# उत्पत्ति



१ प्रारंभीं देवानें आकाश व पृथ्वी हीं उत्पन्न
१ केलीं. २ तेव्हां पृथ्वी आकारविरहित व शून्य
होती, जलनिधीच्या पृष्ठभागावर अंधकार होता
आणि देवाचा आत्मा जलावर तळपत राहिला होता.
३ तेव्हां देव बोलला, प्रकाश होवो, आणि प्रकाश
झाला. ४ देवानें प्रकाश पाहिला कीं तो चांगला आहे;
आणि देवानें प्रकाश व अंधकार हे वेगवेगळे केले.
५ देवानें प्रकाशाला दिवस व अंधकाराला रात्र
म्हटलें; आणि सायंकाळ झाला व प्रातःकाळ झाला;
हा पहिला दिवस.

६ मग देव बोलला, जलांच्या मध्यभागीं अंत-
राळ होवो, व तें जलांस दुभागणारें होवो. ७ असें
देवानें अंतराळ केलें आणि अंतराळाखालच्या व
वरच्या जलांस दुभागिलें; आणि तसें झालें. ८ देवानें
अंतराळास आकाश म्हटलें; आणि सायंकाळ झाला
व प्रातःकाळ झाला; हा दुसरा दिवस.

९ मग देव बोलला, आकाशाखालीं जलांचा एके
स्थळीं संचय होवो, व कोरडी जमीन दृष्टीस पडो;
आणि तसें झालें. १० देवानें कोरड्या जमिनीस
भूमि म्हटलें व जलांच्या संचयास समुद्र म्हटलें;
देवानें पाहिलें कीं हें चांगलें आहे. ११ तेव्हां देव
बोलला, हिरवळ, बीज देणारी वनस्पति आणि आप-
आपल्यापरी सबीज फळें देणारीं फळझाडें भूमि
आपल्यावर उपजवो; आणि तसें झालें. १२ हिरवळ,
आपआपल्यापरी बीज देणारी वनस्पति व आपआपल्या-
परी सबीज फळें देणारीं फळझाडें भूमीनें उपजविलीं;
देवानें पाहिलें कीं हें चांगलें आहे. १३ सायंकाळ
झाला व प्रातःकाळ झाला; हा तिसरा दिवस.

१४ मग देव बोलला, दिवस व रात्र हीं भिन्न
करण्यासाठीं आकाशमंडळांत ज्योति होवोत; त्या
चिन्हें, ऋतु, दिवस व वर्षें दाखविणाऱ्या होवोत;
१५ पृथ्वीला प्रकाश देण्यासाठीं आकाशमंडळांत त्या
दीप होवोत; आणि तसें झालें. १६ देवानें दोन
मोठ्या ज्योति केल्या; दिवसावर प्रभुत्व चालविण्यासाठीं
मोठी ज्योति आणि रात्रीवर प्रभुत्व चालविण्यासाठीं
लहान ज्योति; आणि त्यानें तारेहि केले. १७-१८ पृथ्वीवर
प्रकाश पाडावा, दिवस व रात्र यांवर प्रभुत्व चालवावें
आणि प्रकाश व अंधकार यांस भिन्न करावें, म्हणून
देवानें आकाशमंडळांत त्या ज्योति ठेविल्या; देवानें
पाहिलें कीं हें चांगलें आहे. १९ सायंकाळ झाला
व प्रातःकाळ झाला; हा चौथा दिवस.

२० मग देव बोलला, जीवजंतूंच्या थव्यांनीं जलें
भरून जावोत आणि पृथ्वीवरून अंतराळांत पक्षी
उड्डाण करोत. २१ राक्षसी जलचर, जलांत गजबज-
णारे व संचार करणारे प्रत्येक जातीचे सर्व जीव
आणि प्रत्येक जातीचे सपक्ष प्राणी देवानें निर्माण
केले; देवानें पाहिलें कीं हें चांगलें आहे. २२ देवानें
त्यांस आशीर्वाद दिला: सफल व्हा, वृद्धि पावा,
सागरांतील जलें व्यापून टाका; आणि पृथ्वीवर पक्षी
बहुगुणित होवोत. २३ सायंकाळ झाला व प्रातःकाळ
झाला; हा पांचवा दिवस.

२४ मग देव बोलला; प्रत्येक जातीचे ग्रामपशु,
रांगणारे प्राणी व वनपशु असे प्राणधारी जीव पृथ्वी
उपजवो; आणि तसें झालें. २५ असे प्रत्येक जातीचे
वनपशु, ग्रामपशु व जमिनीवर रांगणारे जीव देवानें
केले; देवानें पाहिलें कीं हें चांगलें आहे. २६ मग
देव बोलला, आपल्या प्रतिरूपाचा व आपल्याशीं
सदृश असा मानव आपण करूं; समुद्रांतील मत्स्य,
आकाशांतील पक्षी, पशु, अवघी पृथ्वी आणि पृथ्वीवर
संचार करणारे सर्व जीव यांवर ते सत्ता चालवितील.
२७ देवानें आपल्या प्रतिरूपाचा मनुष्य निर्माण केला;
देवाचें प्रतिरूप असा तो निर्माण केला; नर व

नारी अशीं तीं निर्माण केलीं. २८ देवानें त्यांस आशी-
र्वाद दिला; देव त्यांस म्हणाला, फलद्रूप व्हा, बहु-
गुणित व्हा, पृथ्वी व्यापून टाका व ती सत्तेंत आणा;
समुद्रांतील मत्स्य, आकाशांतील पक्षी व पृथ्वीवर संचार
करणारे सर्व प्राणिमात्र यांवर सत्ता करा. २९ देव बोलला,
पाहा, अवघ्या भूतलावरील बीज देणारी हरएक वनस्पति
व सबीज फळें देणारा प्रत्येक वृक्ष मी तुम्हांस देतों;
हीं तुमचें अन्न होतील; ३० त्याचप्रमाणें पृथ्वीवरील सर्व
पशु, आकाशांतील सर्व पक्षी व पृथ्वीवर संचार करणारे
सर्व जीवधारी यांस अवघी हिरवळ खावयासाठीं
देतों; आणि तसें झालें. ३१ आपण निर्माण केलेलें सर्व
बहुत चांगलें आहे असें देवानें पाहिलें. सायंकाळ
झाला व प्रातःकाळ झाला; हा सहावा दिवस.

२ १ याप्रमाणें आकाश व पृथ्वी आणि तेथील
सर्व वस्तुगण हीं सिद्ध झालीं. २ देवानें चालविलेलें
आपलें काम सातव्या दिवशीं समाप्त केलें; चाल-
विलेल्या सर्व कामापासून तो सातव्या दिवशीं विश्राम
पावला. ३ देवानें सातवा दिवस आशीर्वाद देऊन
पवित्र ठरविला; कारण सृष्टि निर्माण करण्याचें काम
संपवून तो त्या दिवशीं विश्राम पावला.

४ आकाश व पृथ्वी यांची उत्पत्ति झाली, म्हणजे
परमेश्वर[1] देवानें आकाश व पृथ्वी हीं केलीं त्या
काळचा उत्पत्तिक्रम हा होय. ५ शेतांतलें कोणतेंहि
उद्भिज्ज अद्यापि पृथ्वीवर नव्हतें; शेतांतली कोणतीहि
वनस्पति अद्यापि उगवली नव्हती; कारण परमेश्वर
देवानें अजून पृथ्वीवर पाऊस पाडिला नव्हता, आणि
जमिनीची मशागत करण्यास कोणी मनुष्य नव्हता;
६ मात्र जमिनीवरून धुकें वर जात असे व त्यानें
भूमीच्या सर्व पृष्ठभागाचें सिंचन होत असे. ७ मग
परमेश्वर देवानें जमिनींतील मातीचा मनुष्य घडिला
व त्याच्या नाकपुड्यांत प्राणवायु फुंकिला; तेव्हां
मनुष्य जीवधारी प्राणी झाला. ८ परमेश्वर देवानें
पूर्वेस एदेनांत बाग लाविली आणि तींत आपण
घडिलेला मनुष्य ठेविला. ९ परमेश्वर देवानें दिसण्यांत
सुंदर व स्वादिष्ट फळें देणारीं अशीं सर्व जातींचीं
झाडें, बागेच्या मध्यभागीं जीवनवृक्ष आणि बऱ्या-
वाइटाचें ज्ञान करून देणारा वृक्ष हीं जमिनींतून उग-
वविलीं. १० बागेला पाणी देण्यासाठीं एदेनांत एक
नदी उगम पावली; तेथून ती निघून तिचे फाटे
फुटून चार प्रचंड नद्या झाल्या. ११ पहिलीचें नांव
पीशोन; ही सगळ्या हवीला देशास वेढितें; ह्या
देशांत सोनें सांपडतें; १२ ह्या देशचें सोनें उत्तम
असून येथें मोत्यें व गोमेद हीं सांपडतात. १३ दुस-
रीचें नांव गीहोन; संपूर्ण कूश देशास वेढणारी ती
हीच नदी. १४ तिसरीचें नांव हिद्देकेल; अश्शूरच्या
पूर्वेस वाहते ती हीच. चौथीचें नांव फरात.
१५ परमेश्वर देवानें मनुष्यास एदेन बागेंत नेऊन
त्याची मशागत व राखण करण्यास ठेविलें. १६ तेव्हां
परमेश्वर देवानें आदामाला अशी आज्ञा दिली कीं
बागेंतील वाटेल त्या झाडाचें फळ यथेच्छ खा;
१७ पण बऱ्यावाइटाचें ज्ञान करून देणाऱ्या झाडाचें फळ
खाऊं नको; कारण ज्या दिवशीं त्याचें फळ तूं खाशील
त्या दिवशीं तूं खास मरशील.

१८ मग परमेश्वर देव म्हणाला, मनुष्य एकटा
असावा हें बरें नाहीं; तर त्याला अनुरूपसा सहकारी मी
निर्माण करीन. १९ परमेश्वर देवानें सर्व वनपशु
आणि आकाशांतील सर्व पक्षी हे मातीचे घडिल्यावर
आदाम त्यांस कोणतीं नांवें देतो हें पाहावें म्हणून
त्याजकडे ते त्यानें नेले; तेव्हां आदामानें प्रत्येक
सजीव प्राण्याला जें नांव दिलें तेंच त्याचें नांव
पडलें. २० आदामानें सर्व ग्रामपशु, आकाशांतील
पक्षी व सर्व वनपशु, यांस नांवें दिलीं; पण त्यांमध्यें
त्याला अनुरूपसा कोणी सहकारी मिळाला नाहीं. २१ मग
परमेश्वर देवानें आदामावर गाढ निद्रा आणिली; आणि
तो निजला तेव्हां त्यानें त्याची एक फासळी काढून
घेतली, तिची जागा मांसानें भरून आली; २२ पर-
मेश्वर देवानें आदामाची फासळी काढून तिची स्त्री
बनविली आणि तिला आदामाकडे नेलें. २३ तेव्हां

१ मुळांत याव्हे.

आदाम म्हणाला, आतां ही मात्र माझ्या हाडांतलें हाड
व मांसांतलें मांस आहे; हिला नारी म्हणावें, कारण ही
नरापासून बनविली आहे. २४ यास्तव पुरुष आपल्या
आईबापांस सोडून आपल्या स्त्रीशीं जडून राहील; तीं दोघें
एकदेह होतील. २५ आदाम व त्याची स्त्री हीं दोघें
नग्न होतीं; तरी त्यांस संकोच वाटत नसे.

३ १ परमेश्वर देवानें उत्पन्न केलेल्या सर्व वन-
चरांत सर्प फार धूर्त होता. तो स्त्रीला म्हणाला,
तुम्हीं बागेंतल्या कोणत्याहि झाडाचें फळ खाऊं नये
असें देवानें तुम्हांस सांगितलें हें खरें काय? २ स्त्रीनें
सर्पास म्हटलें, बागेंतल्या झाडांचीं फळें खाण्याची
आम्हांला मोकळीक आहे; ३ पण बागेच्या मध्यभागीं
असलेल्या झाडाच्या फळाविषयीं देवानें सांगितलें
आहे कीं तें खाऊं नका; त्याला स्पर्शहि करूं नका,
कराल तर मराल. ४ सर्प स्त्रीला म्हणाला, तुम्हीं
खरोखर मरणार नाहीं; ५ देवाला हें ठाऊक
आहे कीं तुम्हीं त्याचें फळ खाल त्याच दिवशीं तुमचे
डोळे उघडतील, आणि तुम्हांस बरेंवाईट कळूं लागून
तुम्हीं देवासमान व्हाल. ६ त्या झाडाचें फळ खाण्यास
चांगलें, दिसण्यांत मनोहर आणि शहाणपणाच्या प्राप्तीस
इष्ट आहे असें त्या स्त्रीला दिसून आलें; तेव्हां तिनें
त्याचें फळ काढून खाल्लें व आपल्याबरोबर आपल्या
पतीसहि तें दिलें, व त्यानें तें खाल्लें. ७ तेव्हां त्या
उभयतांचे डोळे उघडले आणि आपण नग्न आहों असें
त्यांस कळून आलें; तेव्हां त्यांनीं अंजिराचीं पानें शिवून
आपणांसाठीं कटिवेष्टनें केलीं.

८ यानंतर शिळोप्याचा वारा सुटला असतां परमेश्वर
देव बागेंत फिरत होता, त्याचा शब्द त्यांस ऐकूं आला,
तेव्हां परमेश्वर देवाच्या दृष्टीस पडूं नये म्हणून आदाम व
त्याची स्त्री हीं बागेंतील झाडांच्याआड लपलीं. ९ परमेश्वर
देवानें आदामास हाक मारून म्हटलें, तूं कोठें आहेस?
१० तो म्हणाला, मीं बागेंत तुझा शब्द ऐकला,
तेव्हां मी नग्न आहें म्हणून भिऊन लपलों. ११ देवानें
म्हटलें, तूं नग्न आहेस हें तुला कोणीं सांगितलें? ज्या
झाडाचें फळ तूं खाऊं नको अशी मीं तुला आज्ञा
केली होती त्याचें फळ तूं खाल्लें काय? १२ आदाम
म्हणाला, जी स्त्री तूं मला सोबतीस दिली तिनें त्या
झाडाचें फळ मला दिलें आणि तें मीं खाल्लें. १३ पर-
मेश्वर देव त्या स्त्रीला म्हणाला, हें तूं काय केलें? स्त्री
म्हणाली, सर्पानें मला भुरळ घातली म्हणून मीं तें
खाल्लें. १४ तेव्हां परमेश्वर देव सर्पास म्हणाला, तूं
हें केलें म्हणून सर्व ग्रामपशु व वनचर यांहून तूं
शापग्रस्त हो; तूं पोटानें चालशील आणि जन्मभर
माती खाशील; १५ आणि तूं व स्त्री, तुझी संतति व
तिची संतति यांमध्यें मी परस्परवैर स्थापीन; ती तुझें
डोकें फोडील, व तूं तिची टांच फोडिशील. १६ तो
स्त्रीला म्हणाला, तुला बहुत दुःख होईल व
गर्भधारणेचे क्लेश होतील; तूं क्लेशानें लेंकरें
प्रसवशील; तरी तुझा ओढा नवऱ्याकडे राहील आणि
तो तुजवर स्वामित्व चालवील. १७ आदामास तो
म्हणाला, तूं आपल्या स्त्रीचें ऐकलें आणि ज्या
झाडाचें फळ खाऊं नको म्हणून मीं तुला आज्ञा केली
होती त्याचें फळ तूं खाल्लें; म्हणून तुझ्यामुळें भूमीला
शाप आला आहे; तूं जन्मभर कष्ट करून तिचा
उपज खाशील; १८ ती तुला कांटे व कुसळें देईल;
तूं शेतांतलें पीक खाशील; १९ तूं आपल्या निढळाच्या
घामानें भाकर मिळवून खाशील व अंतीं पुनः मातीला
जाऊन मिळशील; कारण तींतून तुझी उत्पत्ति आहे; तूं
माती आहेस आणि मातीला परत जाऊन मिळशील.
२० आदामानें आपल्या बायकोचें नांव हव्वा ठेविलें;
कारण ती अवघ्या जीवधारी जनांची माता होय.
२१ परमेश्वर देवानें आदाम व त्याची स्त्री यांसाठीं
चर्मवस्त्रें करून त्यांस लेवविलीं.

२२ मग परमेश्वर देव म्हणाला, पाहा, मानवाला
बरेंवाईट कळूं लागून तो आमच्यांतल्या एकासमान
झाला आहे; तर तो आपला हात जीवनवृक्षाला लावून
त्याचेंहि फळ काढून कदाचित् खाईल व सर्वकाळ
जीवंत राहील; २३ यास्तव ज्या भूमींतून त्यास
निर्माण केलें होतें, तिची लागवड करावी म्हणून पर-
मेश्वर देवानें त्यास एदेन बागेंतून बाहेर काढून

लाविलें. २४ देवानें मानवास बाहेर घालविलें आणि
जीवनवृक्षाकडे जाण्याच्या मार्गाची राखण करण्यासाठीं
एदेन बागेच्या पूर्वभागीं करूब व गरगर फिरणारी
ज्वालारूप तरवार ठेविली.

१ आदामानें आपली स्त्री हव्वा हिला जाणिलें;
४ ती गर्भवती होऊन तिनें काइनास जन्म दिला; ती
म्हणाली, परमेश्वराच्या साहाय्यानें मला पुरुषसंतान
लाभलें आहे. २ नंतर तिनें त्याचा भाऊ हाबेल यास जन्म
दिला. हाबेल मेंढपाळ झाला, आणि काइन शेतकरी
झाला. ३ कांहीं काळ लोटल्यावर असें झालें कीं
काइनानें परमेश्वराला शेताच्या उत्पन्नापैकीं कांहीं
अर्पण करावयास आणिलें. ४ हाबेलानेंहि आपल्या
कळपांतील प्रथम जन्मलेल्या पुष्ट मेंढरांपैकीं कांहीं
अर्पण करावयास आणिलीं. परमेश्वरानें हाबेल व
त्याचें अर्पण यांचा आदर केला; ५ पण काइन व
त्याचें अर्पण यांचा त्यानें आदर केला नाहीं. हें पाहून
काइन संतापला व त्याचें तोंड उतरलें. ६ तेव्हां
परमेश्वर काइनास म्हणाला, तूं कां संतापलास?
तुझें तोंड कां उतरलें? ७ तूं बरें केलें तर तुझी
मुद्रा प्रसन्न होणार नाहीं काय? पण तूं बरें केलें
नाहीं तर दाराशीं पाप टपूनच आहे; त्याचा रोख
तुजवर आहे, करितां तूं त्यास दाबांत ठेव. ८ मग
काइनाचें त्याचा भाऊ हाबेल याशीं बोलणें झालें;
आणि असें झालें कीं ते दोघे शेतांत असतां काइना-
नें आपला भाऊ हाबेल याजवर चालून जाऊन
त्यास ठार केलें. ९ मग परमेश्वरानें काइनास
विचारिलें, तुझा भाऊ हाबेल कोठें आहे? तो
म्हणाला, मला ठाऊक नाहीं; मी काय माझ्या भावाचा
राखणदार आहें? १० तो म्हणाला, तूं हें काय केलें?
ऐक: तुझ्या भावाचें रक्त भूमींतून मजकडे ओरड
करीत आहे. ११ तर आतां तुझ्या हातून तुझ्या
भावाचें पडलेलें रक्त प्राशन करण्यास भूमीनें तोंड
उघडिलें आहे; तिचा तुला शाप आहे; १२ तूं शेत
करिशील तेव्हां ती यापुढें तुला आपलें सत्त्व देणार नाहीं;
तूं पृथ्वीवर परागंदा व भटकणारा होशील. १३ तेव्हां
काइन परमेश्वरास म्हणाला, हा माझा दंड मला
सोसवणार नाहीं इतका भारी आहे. १४ पाहा,
भूमीवरून तूं मला आज हाकून दिलें आहे; मला
तुझ्या दृष्टीआड लपणें भाग आहे; मी पृथ्वीवर परा-
गंदा व भटकणारा होणार; आणि ज्या कोणाला मी
सांपडेन तो मला ठार करील असें होणार. १५ पर-
मेश्वर त्यास म्हणाला, तर मग जो कोणी काइनास
जिवें मारील त्याचा सातपट सूड घेण्यांत येईल.
तेव्हां काइन कोणाच्या हातीं लागल्यास त्यानें त्याचा
वध करूं नये म्हणून त्याला परमेश्वरानें खूण करून
ठेविली.

१६ काइन परमेश्वरासमोरून निघाला आणि एदे-
नाच्या पूर्वेस नोद देशांत वस्ती करून राहिला.
१७ काइनानें आपल्या बायकोस जाणिलें, आणि ती
गर्भवती होऊन तिला हनोख झाला; काइनानें एक
नगर बांधिलें; त्याचें नांव त्यानें आपल्या पुत्राच्या
नांवावरून हनोख असें ठेविलें. १८ हनोखाला इराद
झाला; इरादाला महूयाएल झाला; महूयाएलास मथु-
शाएल झाला आणि मथुशाएलास लामेख झाला.
१९ लामेखानें दोन बायका केल्या; एकीचें नांव आदा
व दुसरीचें नांव सिल्ला. २० आदा हिला याबाल
झाला; तो पाल देऊन राहणारे व गुरेंढोरें पाळणारे
यांचा मूळपुरुष झाला. २१ त्याच्या भावाचें नांव
युबाल असें होतें; तो तंतुवाद्यें व वायुवाद्यें वाजविणाऱ्या
सर्वांचा मूळपुरुष झाला. २२ सिल्ला हिलाहि तुबल-
काइन झाला; तो पितळेचीं व लोखंडाचीं धारेचीं सर्व
हत्यारें घडणारा झाला; आणि तुबल-काइनास नामा म्हणून
बहीण होती. २३ लामेख आपल्या बायकांस म्हणाला;

आदे व सिल्ले, तुम्ही माझा शब्द ऐका;
लामेखाच्या बायकांनो, माझ्या भाषणाकडे
कान द्या;
कोणा पुरुषानें मला घाय केल्यास,
कोणा तरुणानें मला प्रहार केल्यास,
मी त्याला निश्चयें जिवें मारीन;
२४ काइनाबद्दल सातपट सूड घ्यावयाचा

तर लामेखाबद्दल सत्याहत्तरपट घेण्यांत येईल.

२५ आदामानें आपल्या बायकोस पुनः जाणिलें, आणि तिला पुत्र झाला; त्याचें नांव तिनें शेथ ठेविलें; ती म्हणाली, काइनानें हाबेलाचा घात केला म्हणून देवानें त्याच्या जागीं मला दुसरें अपत्य दिलें आहे. २६ शेथ याला पुत्र झाला त्याचें नांव त्यानें अनोश असें ठेविलें; त्या काळापासून लोक परमेश्वराच्या नामानें प्रार्थना करूं लागले.

५ १ आदामाच्या वंशावळीची नोंद येणेंप्रमाणें : देवानें मानव निर्माण केला त्या वेळीं त्यानें तो आपल्या प्रतिरूपाचा केला; २ त्यानें त्यांस नर व नारी अशीं उत्पन्न केलीं व त्यांस आशीर्वाद दिला; आणि त्यांस उत्पन्न केलें त्या वेळीं त्यांस आदाम हें नांव दिलें. ३ आदाम एकशेंतीस वर्षांचा झाल्यावर त्याला त्याच्या प्रतिरूपाचा, त्याच्या प्रतिमेचा पुत्र झाला, त्याचें नांव त्यानें शेथ ठेविलें; ४ शेथ झाल्यावर आदाम आठशें वर्षें जगला, व त्यास आणखी पुत्र व कन्या झाल्या. ५ आदाम एकंदर नवशेंतीस वर्षें जगला; मग तो मरण पावला.

६ शेथ एकशेंपांच वर्षांचा झाल्यावर त्यास अनोश झाला; ७ अनोश झाल्यावर शेथ आठशेंसात वर्षें जगला, व त्यास आणखी पुत्र व कन्या झाल्या; ८ शेथाचें एकंदर आयुष्य नवशेंबारा वर्षांचें झालें; मग तो मरण पावला.

९ अनोश नव्वद वर्षांचा झाल्यावर त्यास केनान झाला; १० केनान झाल्यावर अनोश आठशेंपंधरा वर्षें जगला, व त्यास आणखी पुत्र व कन्या झाल्या; ११ अनोशाचें एकंदर आयुष्य नवशेंपांच वर्षांचें झालें; मग तो मरण पावला.

१२ केनान सत्तर वर्षांचा झाल्यावर त्यास महलल्लेल झाला; १३ महलल्लेल झाल्यावर केनान आठशेंचाळीस वर्षें जगला, व त्यास आणखी पुत्र व कन्या झाल्या; १४ केनानाचें एकंदर आयुष्य नवशेंदहा वर्षांचें झालें; मग तो मरण पावला.

१५ महलल्लेल पासष्ट वर्षांचा झाल्यावर त्यास यारेद झाला; १६ यारेद झाल्यावर महलल्लेल आठशेंतीस वर्षें जगला, व त्यास आणखी पुत्र व कन्या झाल्या; १७ महलल्लेल याचें एकंदर आयुष्य आठशेंपंचाण्णव वर्षांचें झालें; मग तो मरण पावला.

१८ यारेद एकशेंबासष्ट वर्षांचा झाल्यावर त्यास हनोख झाला; १९ हनोख झाल्यावर यारेद आठशें वर्षें जगला, व त्यास आणखी पुत्र व कन्या झाल्या; २० यारेदाचें एकंदर आयुष्य नवशेंबासष्ट वर्षांचें झालें; मग तो मरण पावला.

२१ हनोख पासष्ट वर्षांचा झाल्यावर त्याला मथुशलह झाला; २२ मथुशलह झाल्यावर हनोख तीनशें वर्षें देवाच्या समागमें राहिला, व त्यास आणखी पुत्र व कन्या झाल्या; २३ हनोखाचें एकंदर आयुष्य तीनशेंपासष्ट वर्षांचें झालें; २४ हनोख देवाच्या समागमें राहत असे; देवानें त्याला नेलें आणि तो दिसेनासा झाला.

२५ मथुशलह एकशेंसत्यायशीं वर्षांचा झाल्यावर त्यास लामेख झाला; २६ लामेख झाल्यावर मथुशलह सातशेंब्यायशीं वर्षें जगला, व त्यास आणखी पुत्र व कन्या झाल्या; २७ मथुशलहाचें एकंदर आयुष्य नवशेंएकुणसत्तर वर्षांचें झालें, मग तो मरण पावला.

२८ लामेख एकशेंब्यायशीं वर्षांचा झाल्यावर त्यास पुत्र झाला; २९ त्याचें नांव त्यानें नोहा असें ठेविलें; तो म्हणाला, जी भूमि परमेश्वरानें शापिली तिच्यासंबंधाचें आमचें काम व आमच्या हातचे कष्ट यांविषयीं हा आम्हांस आराम देईल. ३० नोहा झाल्यावर लामेख पांचशेंपंचाण्णव वर्षें जगला; व त्यास आणखी पुत्र व कन्या झाल्या; ३१ लामेखाचें एकंदर आयुष्य सातशेंसत्याहत्तर वर्षांचें झालें; मग तो मरण पावला.

३२ नोहा पांचशें वर्षांचा झाला तेव्हां त्याला शेम, हाम व याफेथ हे झाले.

६ १ नंतर भूतलावर मानवांची वाढ होऊं लागली आणि त्यांस कन्या झाल्या; २ तेव्हां मानवकन्या सुंदर आहेत असें देवपुत्रांनीं पाहिलें, व ज्या त्यांना पसंत वाटल्या त्या त्यांनीं बायका केल्या. ३ तेव्हां परमेश्वर

म्हणाला, माझ्या आत्म्याची मानवाच्या ठायीं सर्वकाळ सत्ता राहणार नाहीं; तो भ्रांत झाल्यामुळें देहरूप ठरला आहे; तथापि त्याला एकशेंवीस वर्षांचा काळ दिला आहे. ४ त्या काळीं भूतलावर नेफिलिम (महाकाय) होते; पुढें देवपुत्र मानवकन्यांपाशीं गेले तेव्हां त्यांस पुत्र झाले, ते प्राचीन काळचे महावीर असून नामांकित पुरुष होऊन गेले.

५ पृथ्वीवर मानवांची दुष्टाई फार आहे, त्यांच्या मनांत येणारे सर्व विचारतरंग केवळ एकसारखे वाईट असतात असें परमेश्वरानें पाहिलें; ६ म्हणून मानव पृथ्वीवर उत्पन्न केल्याचा परमेश्वराला पस्तावा झाला आणि त्याच्या चित्ताला खेद झाला. ७ तेव्हां परमेश्वर म्हणाला, मी उत्पन्न केलेल्या मानवास भूतलावरून नष्ट करीन; मानव, पशु, रांगणारे प्राणी, आकाशांतील पक्षी हे सारे नाहींतसे करीन; कारण त्यांस उत्पन्न केल्याचा मला पस्तावा झाला आहे; ८ परंतु नोहावर परमेश्वराची कृपादृष्टि होती.

९ नोहाचा वृत्तांत येणेंप्रमाणें: नोहा हा आपल्या काळच्या लोकांमध्यें धार्मिक व सात्विक मनुष्य होता; नोहा देवाच्या समागमें राहत असे. १० नोहाला शेम, हाम व याफेथ असे तीन पुत्र झाले. ११ त्या काळीं देवाच्या दृष्टीनें पृथ्वी भ्रष्ट झाली असून ती घोर कर्मांनें भरली होती. १२ देवानें पृथ्वीकडे अवलोकन केलें तों त्याला ती भ्रष्ट आहे अशी दिसली; कारण पृथ्वीवरील सर्व प्राण्यांनीं आपली चालचलणूक बिघडविली होती.

१३ मग देव नोहाला म्हणाला, सर्व प्राण्यांचा अंत करण्याचें माझ्या मनांत आलें आहे, कारण त्यांच्यामुळें पृथ्वीवर अनर्थ माजला आहे; पाहा, मी पृथ्वीसह त्यांचा नाश करीन. १४ तूं आपल्यासाठीं गोफेर लाकडाचें तारूं कर; त्या तारवांत कोठड्या कर, आणि त्यास आंतून व बाहेरून डामर लाव. १५ तारूं करावयाचें तें असें: त्याची लांबी तीनशें हात, रुंदी पन्नास हात व उंची तीस हात असावी. १६ तारवास उजेडासाठीं खिडकी कर; तिचा माथा वरपासून एक हात असेल अशी ती कर; तारवाच्या एका बाजूस दार ठेव; त्याला खालचा, दुसरा व तिसरा असे मजले कर. १७ पाहा, ज्या देहधाऱ्यांच्या ठायीं प्राण आहे ते सर्व आकाशाखालून नाहींतसे करावे म्हणून मी पृथ्वीवर जलाचा प्रलय आणितों; पृथ्वीवर जें कांहीं आहे तें नष्ट होईल; १८ तरी तुजशीं मी आपला करार स्थापित करितों; तूं आपले पुत्र, आपली स्त्री व आपल्या सुना यांस घेऊन तारवांत जा. १९ सर्व प्राण्यांच्या प्रत्येक जातींतून नर व मादी अशीं दोन-दोन जीवंत राखण्यासाठीं आपल्याबरोबर तारवांत ने. २० पक्ष्यांच्या प्रत्येक जातींतून, पशूंच्या प्रत्येक जातींतून आणि भूमीवर रांगणाऱ्या प्राण्यांच्या प्रत्येक जातींतून दोनदोन प्राणरक्षणार्थ तुजकडे येतील. २१ खाण्यांत येतें तें सर्व प्रकारचें अन्न आपल्यापाशीं आणून त्याचा सांठा कर; तें तुला व त्यांना खावयास मिळेल. २२ नोहानें तसें केलें; देवानें त्याला जें कांहीं सांगितलें तें त्यानें केलें.

७ १ मग परमेश्वरानें नोहाला सांगितलें, तूं आपल्या सगळ्या कुटुंबासह तारवांत चल; कारण या पिढींत तूंच मजशीं धर्मानें वर्तणारा असा मला दिसला आहेस. २ सर्व शुद्ध पशूंपैकीं नरमाद्या सातसात आणि अशुद्ध पशूंपैकीं नरमाद्या दोनदोन, ३ आणि आकाशांतील पक्ष्यांपैकीं नरमाद्या सातसात अशीं बरोबर घे; अशानें भूतलावर त्यांचें बीज राहील. ४ अजून सात दिवसांचा अवकाश आहे; मग मी चाळीस दिवस व चाळीस रात्री पृथ्वीवर पर्जन्य पाडणार, आणि उत्पन्न केलेलें सर्व कांहीं मी भूतलावरून नाहींसें करणार. ५ तेव्हां नोहानें परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें सर्व कांहीं केलें.

६ पृथ्वीवर जलप्रलय झाला त्या वेळीं नोहा सहाशें वर्षांचा होता. ७ हा जलप्रलय येऊन ठेपला म्हणून नोहा आपले पुत्र, बायको व सुना यांस घेऊन तारवांत गेला. ८ शुद्ध व अशुद्ध पशुपक्षी व भूमीवर रांगणारे सर्व प्राणी यांतून ९ नर व मादी अशीं जोडीजोडीनें, देवानें नोहाला आज्ञा केल्याप्रमाणें, तारवांत

त्याजकडे गेलीं. १० सात दिवसांनंतर प्रलयाचें जल पृथ्वी-
वर आलें. ११ नोहाच्या वयाच्या सहाशाव्या वर्षी दुसऱ्या
महिन्याच्या सतराव्या दिवशीं महाजलाशयाचे सर्व झरे
फुटले आणि आकाशकपाटें उघडलीं. १२ चाळीस दिवस
व चाळीस रात्री पृथ्वीवर पावसानें झोड लाविली.
१३ याच दिवशीं नोहा, आणि त्याचे पुत्र
शेम, हाम व याफेथ, आणि त्यांच्याबरोबर नोहाची
बायको व त्याच्या तिघी सुना हीं तारवांत गेलीं;
१४ हीं आणि प्रत्येक जातीचे वनपशु, प्रत्येक
जातीचे ग्रामपशु, प्रत्येक जातीचे रांगणारे आणि प्रत्येक
जातीचे उडणारे प्राणी आणि सर्व जातींचे पक्षी हीं
तारवांत गेलीं. १५ सर्व देहधारी प्राण्यांपैकीं एकएक
जोडी नोहाकडे तारवांत गेली. १६ देवानें नोहाला
आज्ञा केल्याप्रमाणें सर्व देहधारी प्राण्यांपैकीं एकएक नर-
मादी आंत गेलीं; मग परमेश्वरानें त्याला आंत कोंडिलें.
१७ पृथ्वीवर जलप्रलय चाळीस दिवस चालला, आणि
पाणी वाढल्यामुळें तारूं जमीन सोडून पाण्यावर तरंगत
राहिलें. १८ प्रलय होऊन पृथ्वीवर जल फार वाढलें
आणि तारूं पाण्याच्या पृष्ठभागावर तरंगत चाललें.
१९ पृथ्वीवर पाणी अतिशयित प्रबळ होऊन त्यानें
समग्र आकाशाखालचे सर्व उंच पर्वत बुडविले.
२० पाणी त्यांच्यावर पंधरा हात चढलें; याप्रमाणें
सर्व डोंगर झांकून गेले. २१ तेव्हां पृथ्वीवर संचार
करणारे सर्व प्राणी म्हणजे पक्षी, ग्रामपशु, वनपशु,
पृथ्वीवर गजबजून राहिलेले सर्व जीवजंतु व सर्व मानव
हे मरण पावले; २२ ज्यांच्या म्हणून नाकपुड्यांत प्राण
होता ते कोरड्या जमिनीवरले झाडून सारे मेले.
२३ पृथ्वीच्या पाठीवर असणारे सर्व कांहीं म्हणजे
मानव, पशु, रांगणारे प्राणी व आकाशांतील पक्षी या
सर्वांचा नाश देवानें केला; तीं पृथ्वीवरून नाहींतशीं
झालीं; नोहा व त्याजबरोबर तारवांत होते तेवढे मात्र
वांचले. २४ दीडशें दिवसपर्यंत पाणी पृथ्वी व्यापून होतें.
१ मग देवानें नोहा व तारवांत त्यांच्याबरोबर
८ असलेले वनपशु आणि ग्रामपशु, या सर्वांची आठवण
केली; देवानें पृथ्वीवर वारा वाहविला तेव्हां पाणी
ओसरलें; २ जलाशयाचे झरे व आकाशकपाटें बंद
झालीं, आणि आकाशांतून पावसाची झोड होत होती
ती थांबली; ३ पृथ्वीवरचें पाणी एकसारखें हटत गेलें;
दीडशें दिवस संपल्यावर पाणी ओसरूं लागलें.
४ सातव्या महिन्याच्या सतराव्या दिवशीं अरारात
येथील एका पर्वतावर तारूं टेकलें. ५ दहाव्या महिन्या-
पर्यंत पाणी एकसारखें ओसरत होतें; व दहाव्या महिन्या-
च्या प्रतिपदेस डोंगरांचे माथे दिसूं लागले.
६ याला चाळीस दिवस लोटल्यावर तारवास खिडकी
केली होती ती नोहानें उघडिली, ७ आणि एक कावळा
बाहेर सोडिला; तो पृथ्वीवरलें पाणी ओसरेपर्यंत इकडे-
तिकडे फिरत राहिला. ८ पाणी भूपृष्ठावरून ओसरलें किंवा
नाहीं हें समजण्यासाठीं त्यानें एक कबुतर बाहेर
सोडिलें; ९ त्या कबुतराला पाय टेकण्यास कोठें आधार
न मिळाल्यामुळें तें तारवाकडे परत आलें; कारण
सगळ्या पृथ्वीच्या पाठीवर अद्यापि पाणी होतें;
तेव्हां नोहानें हात बाहेर काढून त्याला धरून आपल्या-
कडे तारवांत घेतलें. १० त्यानें आणखी सात
दिवस वाट पाहून तारवांतून त्या कबुतराला पुनः
बाहेर सोडिलें; ११ सायंकाळीं तें कबुतर त्याजकडे
आलें, तों त्याच्या चोंचींत जैतुन[1] झाडाचें नुकतेंच
खुडलेलें पान आहे असें त्याला दिसलें; नोहा त्यावरून
समजला कीं आतां पृथ्वीवरचें पाणी ओसरलें आहे.
१२ त्यानें आणखी सात दिवस थांबून त्या कबुतराला
पुनः सोडिलें, तें त्याजकडे पुनरपि परत आलें नाहीं.
१३ सहाशेंएकाव्या वर्षाच्या पहिल्या महिन्याच्या
प्रतिपदेस पृथ्वीवरचें पाणी सुकून गेलें तेव्हां नोहानें
तारवाची छावणी काढून पाहिलें तों पृथ्वीचा पृष्ठभाग
वाळला आहे असें त्याला दिसलें. १४ दुसऱ्या महिन्याच्या
सत्ताविसाव्या दिवशीं जमीन खडखडीत वाळली.
१५ मग देव नोहाला म्हणाला, १६ तूं आपली
बायको, पुत्र व सुना यांस घेऊन तारवांतून बाहेर
नीघ. १७ पक्षी, पशु व भूमीवर रांगणारे सर्व जंतु

१ त्या झाडाला इंग्रजींत ऑलिव्ह् म्हणतात.

यांपैकीं जे प्राणी तुजबरोबर आहेत त्या सर्वांस आण,
म्हणजे पृथ्वीवर त्यांची संतति विपुल होईल, ते फल-
वान् होऊन त्यांचा पृथ्वीवर विस्तार होईल. १८ तेव्हां
नोहा आपले पुत्र, बायको व सुना यांस घेऊन बाहेर
निघाला; १९ प्रत्येक पशु, प्रत्येक रांगणारा प्राणी,
प्रत्येक पक्षी असे पृथ्वीवर संचार करणारे प्राणी
जातवारीनें तारवांतून बाहेर निघाले.

२० नंतर नोहानें परमेश्वराप्रीत्यर्थ वेदी बांधिली आणि
सर्व जातींचे शुद्ध पशु व शुद्ध पक्षी यांतले कांहीं घेऊन
त्या वेदीवर त्यांचें हवन केलें. २१ परमेश्वर त्याचा
सुवास घेऊन आपल्या मनांत म्हणाला, मानवामुळें मी
इतःपर भूमीला कधींहि शाप देणार नाहीं; कारण
मानवाच्या मनांतल्या भावना बाळपणापासून दुष्ट
असतात; तर मी आतांच्याप्रमाणें पुनः अखिल
जिवांचा कधींहि संहार करणार नाहीं. २२ पृथ्वी
राहील तोंवर पेरणी व कापणी, थंडी व ऊन,
उन्हाळा व हिंवाळा, रात्र व दिवस हीं व्हावयाचीं
राहणार नाहींत.

९ १ मग देवानें नोहास व त्याच्या
पुत्रांस आशीर्वाद देऊन म्हटलें, फलवान् व्हा,
बहुगुणित व्हा आणि पृथ्वी भरा. २ पृथ्वीवरील सर्व
पशु, आकाशांतील सर्व पक्षी, भूमीवर रांगणारे सर्व
जीवजंतु व समुद्रांतील सर्व मत्स्य यांना तुमचें भय व धाक
राहील; तीं तुमच्या स्वाधीन केलीं आहेत. ३ सर्व संचार
करणारे प्राणी तुमचें अन्न होतील; वनस्पति ज्याप्रमाणें
तुम्हांस दिली होती त्याप्रमाणें सर्व कांहीं आतां तुम्हांस
देतों. ४ तथापि मांसाचें जीवन रक्त आहे म्हणून
रक्तासकट मांस खाऊं नका. ५ मी तुमच्या रक्ताबद्दल
म्हणजे तुमच्या जिवाबद्दल झाडा घेईन; हरएक पशूचा
व मनुष्याचा झाडा घेईन; प्रत्येक मनुष्याचा त्याच्या
भावाच्या जिवाबद्दल झाडा घेईन. ६ जो कोणी
मनुष्याचा रक्तपात करील त्याचा रक्तपात मनुष्या-
कडून होईल; कारण देवानें मनुष्य आपल्या प्रति-
रूपाचा उत्पन्न केला आहे. ७ तुम्ही फलवान् व्हा,
बहुगुणित व्हा, पृथ्वीवर विपुल वंशवृद्धि करा, तीवर
बहुगुणित व्हा.

८ देव नोहास व त्याजबरोबर त्याच्या पुत्रांस
म्हणाला, ९ पाहा, मी तुम्हांशीं व तुमच्यामागें तुमच्या
संततीशीं करार करून ठेवितों; १० त्याप्रमाणेंच
तुम्हांबरोबर असलेले सर्व जिवंत प्राणी, म्हणजे
तुम्हांबरोबर तारवांतून बाहेर आलेले पशु, पक्षी व
पृथ्वीवरील इतर सर्व प्राणी यांशींहि मी करार करून
ठेवितों. ११ तुम्हांशीं हा करार करून ठेवितों कीं
पुनः जलप्रलयानें प्राणिमात्र नष्ट होणार नाहींत, आणि
पृथ्वीनाश करणारा जलप्रलय पुनः कधीं व्हावयाचा
नाहीं. १२ देव म्हणाला, माझ्यामध्यें व तुमच्यामध्यें,
त्याप्रमाणेंच तुम्हांबरोबर असणाऱ्या सर्व सजीव प्राण्यां-
मध्यें पिढ्यानपिढ्या, युगानुयुग राहणारा जो करार मी
करीत आहें त्याचें चिन्ह हें; १३ मीं मेघांत धनुष्य
ठेविलें आहे, तें पृथ्वीच्या व माझ्यामधल्या कराराचें
चिन्ह समजावें. १४ मी पृथ्वीच्यावर मेघ पसरीन
व त्यांत धनुष्य दिसेल, १५ तेव्हां माझ्यामध्यें
आणि तुम्ही व सर्व सजीव प्राणी यांच्यामध्यें झालेला
करार मी स्मरेन, आणि यापुढें सर्व देहधाऱ्यांचा
नाश करील असा जलप्रलय होणार नाहीं. १६ धनुष्य
मेघांत दिसेल तें पाहून माझ्यामध्यें आणि पृथ्वी-
वरील सर्व सजीव प्राण्यांमध्यें झालेल्या युगानु-
युग राहणाऱ्या कराराचें मला स्मरण होईल. १७ देव
नोहाला म्हणाला, माझ्यामध्यें व पृथ्वीवरील सर्व
प्राणी यांच्यामध्यें जो करार मीं करून ठेविला आहे
त्याचें हें चिन्ह होय.

१८ नोहाचे पुत्र तारवाबाहेर निघाले त्यांचीं
नांवें शेम, हाम व याफेथ अशीं होतीं; हाम हा
कनानाचा बाप. १९ हे नोहाचे तीन पुत्र; यांच्या-
पासून जगभर लोकविस्तार झाला.

२० नोहा शेतकरी होता, त्यानें द्राक्षांचा मळा
लाविला; २१ तो द्राक्षारस पिऊन मस्त झाला आणि
आपल्या डेऱ्यांत उघडानागडा पडला. २२ तेव्हां
कनानाचा बाप हाम यानें आपल्या बापाची नग्नावस्था
पाहून आपले दोघे भाऊ बाहेर होते त्यांस हें कळविलें.

२३ तेव्हां शेम व याफेथ यांनीं वस्त्र घेऊन आपल्या
खांद्यांवर ठेविलें व पाठमोरे होऊन आपल्या बापाची
नग्नता झाकिली; त्यांचीं तोंडें पाठमोरीं होतीं म्हणून
त्यांस आपल्या बापाची नग्नता दिसली नाहीं. २४ दारू
उतरून सावध झाल्यावर आपल्या धाकट्या पुत्रानें
काय केलें तें नोहाला समजलें. २५ तो म्हणाला:

कनान शापग्रस्त होईल,
तो आपल्या बांधवांचा दासानुदास होईल.

२६ तो म्हणाला,

शेमाचा देव परमेश्वर धन्य !
कनान त्याचा दास होईल.

२७ देव याफेथाचा विस्तार करील;
तो शेमाच्या डेर्‍यांत राहील;
आणि कनान त्याचा दास होईल.

२८ नोहा जलप्रलयानंतर तीनशेंपन्नास वर्षें
जगला. २९ नोहा एकंदर नवशेंपन्नास वर्षें जगला,
मग तो मरण पावला.

**१०** १ नोहाचे पुत्र शेम, हाम व याफेथ यांची
वंशावळ: जलप्रलयानंतर त्यांस पुत्र झाले.
याफेथाचे पुत्र: गोमर, मागोग, मादय,
यावान, तुबाल, मेशेख व तीरास. ३ गोमरचे पुत्र:
आष्कनाज, रीपाथ व तोगार्मा. ४ यावानाचे पुत्र:
अलीशा, तार्शीश, कित्तीम व दोदानीम. ५ यांनीं
समुद्रतीरींचे निरनिराळे देश वसविले; भाषा, कुळ व
राष्ट्र यांपरत्वें ते भिन्नभिन्न झाले.
६ हामाचे पुत्र: कूश, मिस्राईम, पूट व कनान.
७ कूशाचे पुत्र: सबा, हवीला, साब्ता, रामा व
साब्तका; आणि रामाचे पुत्र: शबा व ददान.
८ कूशाला निम्रोद झाला; तो पृथ्वीवर महावीर निप-
जला. ९ तो परमेश्वराच्या दृष्टीनें बलवान् पारधी
झाला, म्हणून निम्रोदासारखा परमेश्वराच्या दृष्टीनें
बलवान् पारधी असें म्हणण्याचा प्रघात आहे.
१० शिनार देशांत बाबेल, एरक, अक्काद, व कालने हीं
त्याच्या राज्याचा आरंभ होत. ११ त्या देशांतून तो
पुढें अश्शुरास गेला व त्यानें निनवे, रहोबोथ-ईर व
कालह हीं वसविलीं; १२ तसेंच निनवे व कालह
यांच्या दरम्यान रेसन शहर त्यानें वसविलें; हेंच तें
मोठें शहर होय. १३ मिस्राईम याला लूदीम, अना-
मीम, लहाबीम, नाप्तुहीम, १४ पात्रुसीम, कास्लूहीम
(यांजपासून पलिष्टी झाले) व कफतोरीम हे झाले.
१५ कनान याला सीदोन (हा त्याचा ज्येष्ठ पुत्र)
आणि हेथ, १६ यबूसी, अमोरी, गिर्गाशी, १७ हिव्वी,
आर्की, शीनी, १८ अर्वादी, समारी व हमाथी हे झाले;
पुढें कनानी कुळांचा विस्तार झाला. १९ कनान्यांची
सीमा सीदोनाहून गरारास जाण्याच्या वाटेवर गज्जेपर्यंत
आणि सदोम, गमोरा, आदमा व सबोईम यांकडे
जाण्याच्या वाटेवर लेशापर्यंत होती. २० कुळ, भाषा, देश
व राष्ट्र यांपरत्वें वर सांगितलेली हामाची संतति होय.
२१ शेम हा सर्व एबर वंशाचा पूर्वज व याफेथाचा
वडील बंधु, यालाहि संतति झाली. २२ शेमाचे
पुत्र: एलाम, अश्शूर, अर्पक्षद, लूद व अराम.
२३ अरामाचे पुत्र: ऊस, हूल, गेतेर व मश.
२४ अर्पक्षदास शेलह झाला, व शेलहास एबर झाला.
२५ एबरास दोन पुत्र झाले, एकाचें नांव पेलेग होतें,
कारण त्याच्या वेळीं पृथ्वीची वांटणी झाली; त्याच्या
भावाचें नांव यक्तान होतें. २६ यक्तानास अलमोदाद,
शेलेफ, हसर्मावेथ, येरह, २७ हदोराम, ऊजाल, दिक्ला,
२८ ओबाल, अबीमाएल, शबा, २९ ओफीर, हवीला
व योबाब असे पुत्र झाले; हे सगळे यक्तानाचे पुत्र.
३० त्यांची वस्ती मेशापासून पूर्वेकडील डोंगर सफार
यांकडे जाण्याच्या वाटेवर होती. ३१ कुळ, भाषा,
देश व राष्ट्र यांपरत्वें ही शेमाची संतति होय.
३२ पिढ्या व राष्ट्रें यांपरत्वें हीं नोहाच्या
वंशजांचीं कुळें सांगितलीं आहेत; जलप्रलयानंतर
त्यांचीं पृथ्वीवर भिन्नभिन्न राष्ट्रें झालीं.

**११** १ सर्व पृथ्वीची एकच भाषा, एकच बोली
होती. २ पुढें असें झालें कीं पूर्वेकडे जातां जातां
त्या लोकांस शिनार देशांत एक मैदान लागलें,
तेथें त्यांनीं वस्ती केली. ३ ते एकमेकांस म्हणाले, चला,
आपण विटा करून पक्क्या भाजूं. त्यांनीं दगडांऐवजीं

विटा आणि चुन्याऐवजीं डामर वापरलें. ४ मग ते
म्हणाले, चला, आपणांसाठीं एक नगर निर्माण करून
गगनचुंबित शिखराचा एक बुरूज बांधूं; ह्या रीतीनें
आपलें नांव करूं, म्हणजे आपली पृथ्वीवर पांगापांग
होणार नाहीं. ५ तेव्हां मानवपुत्र नगर व बुरूज
बांधीत होते तीं पाहण्यास परमेश्वर उतरला. ६ परमे-
श्वर म्हणाला, पाहा, हे लोक एक आहेत, ह्या सर्वांची
भाषाहि एकच आहे, आणि हा ह्यांच्या करणीचा
केवळ आरंभ आहे; तर हे जें कांहीं करण्याचें योजि-
तील तें करण्यास ह्यांना कशानेंहि अटकाव होणार
नाहीं. ७ तर चला, आपण खालीं जाऊन यांच्या भाषेचा
घोटाळा करूं, म्हणजे यांस एकमेकांची बोली समजा-
वयाची नाहीं. ८ नंतर परमेश्वरानें तेथून त्यांस सर्व
पृथ्वीच्या पाठीवर पांगविलें; ह्याप्रमाणें त्यांचें नगर
बांधावयाचें राहिलें. ९ म्हणून त्या नगराचें नांव
बाबेल असें पडलें, कारण त्या ठिकाणीं परमेश्वरानें
सगळ्या जगाच्या भाषेचा घोटाळा करून तेथून त्यांस
सर्व पृथ्वीच्या पाठीवर पांगविलें.

१० शेमाची वंशावळ येणेंप्रमाणें: शेम शंभर
वर्षांचा झाल्यावर जलप्रलयानंतर दोन वर्षांनीं त्याला
अर्पक्षद झाला; ११ अर्पक्षद झाल्यावर शेम पांचशें
वर्षें जगला, आणि त्याला पुत्र व कन्या झाल्या.

१२ अर्पक्षद पस्तीस वर्षांचा असतां त्याला शेलह
झाला; १३ शेलह झाल्यावर अर्पक्षद चारशेंतीन
वर्षें जगला, आणि त्याला पुत्र व कन्या झाल्या.

१४ शेलह तीस वर्षांचा असतां त्याला एबर
झाला. १५ एबर झाल्यावर शेलह चारशेंतीन वर्षें
जगला, आणि त्याला पुत्र व कन्या झाल्या.

१६ एबर चौतीस वर्षांचा असतां त्याला पेलेग
झाला; १७ पेलेग झाल्यावर एबर चारशेंतीस वर्षें
जगला, आणि त्याला पुत्र व कन्या झाल्या.

१८ पेलेग तीस वर्षांचा असतां त्याला रऊ झाला,
१९ रऊ झाल्यावर पेलेग दोनशेंनऊ वर्षें जगला;
आणि त्याला पुत्र व कन्या झाल्या.

२० रऊ बत्तीस वर्षांचा असतां त्याला सरूग झाला;
२१ सरूग झाल्यावर रऊ दोनशेंसात वर्षें जगला,
आणि त्याला पुत्र व कन्या झाल्या.

२२ सरूग तीस वर्षांचा असतां त्याला नाहोर
झाला; २३ नाहोर झाल्यावर सरूग दोनशें वर्षें जगला;
आणि त्याला पुत्र व कन्या झाल्या.

२४ नाहोर एकुणतीस वर्षांचा असतां त्याला तेरह
झाला; २५ तेरह झाल्यावर नाहोर एकशेंएकोणीस
वर्षें जगला, आणि त्याला पुत्र व कन्या झाल्या.

२६ तेरह सत्तर वर्षांचा असतां त्याला अब्राम,
नाहोर व हारान हे झाले.

२७ तेरहाची वंशावळ येणेंप्रमाणें: तेरहाला अब्राम,
नाहोर व हारान हे झाले, व हारानास लोट झाला.
२८ हारान आपला बाप तेरह याच्यादेखत आपली
जन्मभूमि खास्द्यांचें ऊर येथें मरण पावला. २९ अब्राम
व नाहोर यांनीं बायका केल्या; अब्रामाच्या बायकोचें
नांव साराय आणि नाहोराच्या बायकोचें नांव मिल्का;
मिल्का ही हारानाची कन्या; हा हारान मिल्का
व इस्का यांचा बाप. ३० साराय वांझ होती, तिला
मूलबाळ नव्हतें. ३१ मग तेरह आपला पुत्र अब्राम,
आपला नातू म्हणजे हारानाचा पुत्र लोट आणि आपली
सून म्हणजे आपला पुत्र अब्राम याची बायको साराय,
यांस बरोबर घेऊन खास्द्यांच्या ऊर गांवांतून कनान
देशास जाण्यास निघाला; आणि तीं हारान येथें जाऊन
राहिलीं. ३२ तेरहाचें वय दोनशेंपांच वर्षांचें होऊन
तो हारान येथें मरण पावला.

१२ १ परमेश्वरानें अब्रामास सांगितलें, तूं आपला
देश, आपलें गणगोत्र व आपलें पितृगृह सोडून
मी दाखवीन त्या देशांत जा; २ मी तुजपासून
मोठें राष्ट्र निर्माण करीन; तुझें मी कल्याण करीन, तुझें
नांव मोठें करीन; तूं कल्याणमूलक हो; ३ तुझें जे अभीष्ट
चिंतितील त्यांचें मी अभीष्ट करीन; तुझें जे अनिष्ट
चिंतितील त्यांचें मी अनिष्ट करीन; तुझ्या द्वारें पृथ्वी-
वरील सर्व मानव कल्याण पावतील. ४ परमेश्वराच्या
आज्ञेप्रमाणें अब्राम निघून गेला, व त्याजबरोबर लोट
गेला; हारान येथून निघतेवेळीं अब्रामाचें वय पंचाहत्तर

वर्षांचें होतें. ५ आपली बायको साराय, आपला
पुतण्या लोट, त्यांनीं मिळविलेली सर्व मालमत्ता आणि
हारान येथें त्यांनीं संपादन केलेलीं माणसें हीं घेऊन
अब्राम कनान देशांत जावयास निघाला; व कनान
देशांत तीं जाऊन पोहंचलीं. ६ अब्राम त्या देशांतून
शखेमाच्या ठिकाणीं एलोन–मोरेपाशीं गेला. त्या
काळीं त्या देशांत कनानी लोक राहत होते.
७ परमेश्वर अब्रामास दर्शन देऊन म्हणाला, हा देश मी
तुझ्या संतानाला देणार; परमेश्वरानें त्याला दर्शन दिलें
म्हणून त्यानें तेथें परमेश्वराची एक वेदी बांधली.
८ मग तो तेथून निघाला आणि बेथेलच्या पूर्वेकडे
डोंगर होता तेथें जाऊन त्यानें डेरा दिला; त्याच्या
पश्चिमेस बेथेल होतें व पूर्वेस आय होतें; तेथें त्यानें
परमेश्वराची वेदी बांधिली आणि परमेश्वराच्या नामानें
प्रार्थना केली. ९ तेथून निघून अब्राम प्रवास
करीत दक्षिण प्रांताकडे गेला.

१० पुढें देशांत दुष्काळ पडला; तेव्हां कांहीं दिवस
मिसरांत जाऊन राहावें म्हणून अब्राम तिकडे चालता
झाला, कारण त्या देशांतला दुष्काळ फार तीव्र होता.
११ तो मिसरांत प्रवेश करणार तों तो आपली बायको
साराय हिला म्हणाला, अगे, पाहा, तूं दिसावयाला सुंदर
स्त्री आहेस हें मला ठाऊक आहे; १२ तुला मिसरी
लोक पाहतील तेव्हां ही याची बायको आहे असें
म्हणतील, आणि मला मारून टाकून तुला जीवंत
ठेवितील. १३ तर मी याची बहीण आहें असेंच तूं
सांग बरें, म्हणजे तुझ्यामुळें माझें बरें होईल, आणि
तुझ्यायोगें माझा जीव वांचेल. १४ मग अब्राम मिसर
देशांत जाऊन पोहंचला; तेव्हां ती स्त्री फार सुंदर
आहे असें मिसऱ्यांनीं पाहिलें. १५ फारोच्या सरदारांनीं
तिला पाहून त्याच्यापाशीं तिची प्रशंसा केली आणि
तिला त्याच्या घरीं नेऊन ठेविलें. १६ तिच्यामुळें
त्यानें अब्रामाचें बरें केलें, आणि त्याला मेंढरें, बैल,
गाढव, दास, दासी, गाढवी व उंट मिळाले. १७ तरी
अब्रामाची स्त्री साराय हिच्या पायीं परमेश्वरानें फारो व
त्याचें घराणें यांस भारी पीडा भोगावयास लाविली.
१८ तेव्हां फारोनें अब्रामास बोलावून म्हटलें, तूं मला
हें काय केलें ? ही माझी बायको आहे असें तूं मला कां
नाहीं सांगितलें ? १९ ती माझी बहीण आहे असें तूं
मला कां सांगितलें ? मीं तिला आपली बायको करण्या-
साठीं मजकडे ठेविलें होतें; तर आतां ही पाहा
तुझी बायको; हिला घेऊन जा. २० तेव्हां
फारोनें आपल्या दासांना त्याच्यासंबंधानें हुकूम
केला; आणि त्यांनीं त्याची बायको व त्याचें जें कांहीं
होतें त्यासह त्याला वाटेस लाविलें.

**१३** १ अब्राम आपली बायको, आपलें सर्वस्व
आणि लोट यांस घेऊन मिसर देश सोडून
कनानाच्या दक्षिण प्रांतीं गेला. २ तो कळप, रुपें
व सोनें यांहींकरून संपन्न होता. ३ मग मजला करीत
करीत तो दक्षिण प्रांताकडून बेथेलपर्यंत गेला; बेथेल
व आय यांच्या दरम्यान त्यानें आरंभीं डेरा दिला
होता त्या ठिकाणीं तो आला; ४ त्यानें प्रथम वेदी
बांधिली होती त्या स्थळीं तो आला; तेथें त्यानें पर-
मेश्वराच्या नामानें प्रार्थना केली. ५ अब्रामाबरोबर
लोट चालला होता त्याचींहि मेंढरें, गुरेंढोरें व पालें
होतीं. ६ त्यांस एकत्र राहण्यास तो प्रदेश पुरेना;
त्यांची मालमत्ता एवढी झाली कीं त्यांस एका स्थळीं राहतां
येईना. ७ शिवाय अब्रामाच्या व लोटाच्या गुराख्यांचीं
भांडणें होऊं लागलीं; त्या काळीं त्या देशांत कनानी व
परिज्जी यांची वस्ती होती. ८ अब्राम लोटास म्हणाला,
हें पाहा, माझ्यातुझ्यामध्यें, माझे गुराखी व तुझे गुराखी
यांच्यामध्यें तंटा नसावा, कारण आपण भाऊबंद
आहों. ९ सर्व देश तुला मोकळा नाहीं काय ?
तर मजपासून विभक्त हो; तूं डावीकडे गेलास तर मी
उजवीकडे जाईन; तूं उजवीकडे गेलास तर मी डावीकडे
जाईन. १० तेव्हां लोटानें आपली दृष्टि फेकून यार्देनेची
सर्व तळवट पाहिली तों तींत सर्वत्र महापूर पाणी आहे
असें त्याला दिसून आलें; परमेश्वरानें सदोम व गमोरा
यांचा नाश केला त्यापूर्वी सोअरापर्यंतचा सर्व प्रदेश
परमेश्वराच्या बागेसारखा, मिसर देशासारखा होता.
११ ही यार्देनेची सर्व तळवट लोटानें पसंत केली व

तो पूर्वेकडे प्रवास करूं लागला; ते ह्याप्रमाणें एकमेकांपासून
विभक्त झाले. १२ अब्राम कनान देशांत राहिला, व
लोटानें यार्देन प्रांतांतील नगरांतून मुक्काम करीत करीत
आपला डेरा सदोम नगरापाशीं दिला. १३ त्या सदोमांतील
रहिवासी दुष्ट असून परमेश्वराचे महापराधी होते.

१४ लोट अब्रामापासून विभक्त झाल्यावर परमे-
श्वर अब्रामाला म्हणाला, तूं आहेस तेथून उत्तरेकडे,
दक्षिणेकडे, पूर्वेकडे व पश्चिमेकडे दृष्टि लावून पाहा;
१५ जो हा सर्व देश तुला दिसत आहे तो तुला व
तुझ्या संतानाला मी कायमचा देईन. १६ मी तुझी
संतति पृथ्वीच्या रजःकणांसारखी करीन; कोणाला
पृथ्वीच्या रजःकणांची गणना करितां येईल तर तुझ्या
संततीचीहि गणना होईल. १७ ऊठ, या देशाची लांबी-
रुंदी फिरून पाहा, कारण तो मी तुला देणार. १८ मग
अब्राम मुक्काम करीत करीत हेब्रोनाजवळ मम्रेच्या
एलोन राईंत येऊन राहिला; तेथें त्यानें परमेश्वराची
वेदी बांधिली.

१ शिनाराचा राजा अम्राफेल, एल्लासाराचा
**१४** राजा अर्योक, एलामाचा राजा कदार्लागोमर
आणि गोयीमाचा राजा तिदाल यांच्या वेळीं
असें झालें कीं २ त्यांनीं सदोमाचा राजा बेरा,
गमोराचा राजा बिर्शा, अदमाचा राजा शिनाब, सबोयि-
माचा राजा शमेबर आणि बेला म्हणजे सोअर याचा
राजा यांजशीं युद्ध केलें. ३ हे सर्व जूट करून सिद्दीम
खोर्‍यांत जमून गेले; हें खोरें म्हणजेच क्षारसमुद्र. ४ ते
कदार्लागोमर यांचे बारा वर्षें अंकित होते, पण तेराव्या
वर्षी ते त्याजवर उठले. ५ चौदाव्या वर्षी कदार्लागोमर
व त्याच्या पक्षाचे राजे यांनीं येऊन अष्टरोथ-
कर्णईम येथें रेफाई लोकांस, हाम येथें जूजी लोकांस,
किर्याथाईमच्या मैदानांत एमी लोकांस ६ आणि होरी
लोकांस त्यांच्या सेईर डोंगरांत मार देऊन एल्-पारान-
च्या हद्दीवर अरण्य होतें तेथपर्यंत पिटाळून लाविलें.
७ मग मागें परतून एन्-मिशपात म्हणजे कादेश
येथें ते आले व त्यांनीं अमालेकी लोकांचा सगळा देश
जिंकिला व हससोन–तामार येथें राहणार्‍या अमोरी
लोकांसहि मार दिला. ८ इकडे सदोमाचा राजा,
गमोराचा राजा, अदमाचा राजा, सबोयिमाचा राजा
आणि बेला म्हणजे सोअर याचा राजा हे त्यांजशीं
युद्ध करावयास निघाले आणि सिद्दीम खोर्‍यांत त्यांनीं
आपल्या सैन्याची व्यूहरचना केली; ९ एलामाचा
राजा कदार्लागोमर, गोयीमाचा राजा तिदाल,
शिनाराचा राजा अम्राफेल आणि एल्लासाराचा राजा
अर्योक यांशीं ते लढले; चार राजांनीं पांच राजांशीं
सामना केला. १० सिद्दीम खोर्‍यांत डामराच्या
खाणी पुष्कळ होत्या, त्यांत सदोम व गमोरा यांचे
राजे पळत असतां पडले व बाकीचे डोंगरांत पळाले.
११ तेव्हां सदोम व गमोरा येथील मालमत्ता व सगळी
अन्नसामुग्री शत्रु लुटून घेऊन गेले. १२ अब्रामाचा
पुतण्या लोट हा सदोम येथें राहत होता; त्याला त्यांनीं
धरून नेलें आणि त्याची धनदौलतहि नेली.

१३ तेथून पळून आलेल्या एका मनुष्यानें जाऊन अब्राम
इब्री याला हें वर्तमान सांगितलें; त्या वेळीं तो अष्कोल व
आनेर यांचा भाऊ अमोरी मम्रे याच्या एलोन राईंत राहत
होता; हे अब्रामाच्या जुटींत होते. १४ आपल्या
आप्तास पाडाव करून नेलें हें अब्रामानें ऐकलें तेव्हां
आपल्या घरीं जन्मलेले व लढाईच्या कामांत कसलेले
तीनशेंअठरा दास घेऊन त्यानें दानापर्यंत शत्रूंचा
पाठलाग केला. १५ त्यानें आपल्या दासांच्या टोळ्या
करून त्यांजवर रात्रीची चाल केली आणि त्यांस मार
देऊन दिमिष्काच्या उत्तरेस होबा शहर आहे तेथवर
त्यांचा पाठलाग केला. १६ त्यानें सगळी मालमत्ता
माघारी आणिली; त्याप्रमाणेंच आपला आप्त लोट,
त्याची मालमत्ता, स्त्रिया व लोक माघारे आणिले.

१७ कदार्लागोमरचे आणि त्याच्याबरोबरचे राजे यांस
मारून तो माघारीं येत असतां त्याला भेटावयास
सदोमाचा राजा शावेखिंड म्हणजे राजखिंड एथवर
सामोरा गेला; १८ आणि शालेमाचा राजा मलकीसदेक
भाकर व द्राक्षारस घेऊन त्यास सामोरा आला; हा
परात्पर देवाचा याजक होता. १९ त्यानें त्याला येणें-
प्रमाणें आशीर्वाद दिला: आकाशाचा व पृथ्वीचा स्वामी

जो परात्पर देव तो अब्रामाचें कल्याण करो; २० ज्या
परात्पर देवानें तुझे शत्रु तुझ्या स्वाधीन केले तो धन्य!
तेव्हां अब्रामानें त्याला अवघ्याचा दहावा भाग दिला.
२१ मग सदोमाचा राजा अब्रामास म्हणाला, माणसें
मला दे आणि धन तूं ठेव. २२ पण अब्राम सदोमाच्या
राजाला म्हणाला, परमेश्वर परात्पर देव, आकाशाचा
व पृथ्वीचा स्वामी याजसमोर मी बाहु उभारून
सांगतों कीं, २३ तुझा एक सुतळीचा तोडा किंवा वहाणेचा
बंद मी घेणार नाहीं; मीं अब्रामास संपन्न केलें असें
म्हणावयास तुला न सांपडो; २४ ह्या तरुण माणसांनीं
अन्न खाल्लें तेवढें पुरे; मजबरोबर आलेले आनेर,
अश्कोल व मम्रे यांस वांटा मिळाला म्हणजे पुरे;
त्यांना आपला वांटा घेऊं दे.

१५ १ या गोष्टी घडल्यावर अब्रामास दृष्टांत-
रूपानें परमेश्वराचें वचन प्राप्त झालें तें असें:
अब्रामा, भिऊं नको; मी तुझी ढाल आहें; मीच
तुझें परम पारितोषिक आहें. २ अब्राम म्हणाला, हे
परमेश्वरा, हे प्रभू, तूं मला काय देणार? मी तर
असंतान गत होणार; माझ्या घरादाराचा मालक दिमिष्की
अलियेजर हा होणार. ३ अब्राम आणखी म्हणाला, पाहा,
तूं मला कांहीं संतान दिलें नाहीं तर माझ्या घरचा
एक माणूस माझा वारस होणार. ४ तेव्हां परमेश्वराचें
वचन त्याला प्राप्त झालें कीं हा मनुष्य तुझा वारस
होणार नाहीं, तर तुझ्या पोटीं येणाराच तुझा वारस होईल.
५ मग त्यानें त्याला बाहेर आणून म्हटलें, आकाशा-
कडे दृष्टि लाव; तुला हे तारे मोजवतील तर मोज;
इतकी तुझी संतति होईल असें त्यानें त्याला सांगि-
तलें. ६ अब्रामानें परमेश्वरावर विश्वास ठेविला
आणि अब्रामाचा हा विश्वास परमेश्वरानें त्याची नीतिमत्ता
असा गणिला. ७ तो त्याला म्हणाला, मी परमेश्वर आहें;
तुला या देशाचें वतन द्यावें म्हणून खास्द्यांच्या ऊर
गांवांतून ज्यानें तुला आणिलें तो मीच परमेश्वर आहें.
८ तो म्हणाला, प्रभू देवा, मला हें वतन मिळेल
हें कशावरून? ९ देवानें त्याला सांगितलें, तीन
वर्षांची एक कालवड, तीन वर्षांची एक शेळी, तीन
वर्षांचा एक एडका, एक होला आणि पारव्याचें एक
पिलूं अशीं घे. १० त्यानें तीं सर्व घेतलीं व मधोमध
चिरून त्यांचे दोनदोन तुकडे केले आणि प्रत्येकाचे
तुकडे समोरासमोर ठेविले; पक्षी मात्र त्यानें चिरिले
नाहींत. ११ त्या शवांवर हिंस्र पक्ष्यांनीं झडप घातली,
त्यांस अब्रामानें हाकून दिलें.

१२ सूर्यास्ताच्या सुमारास अब्रामास गाढ झोप लागली
तों घोर भीतीनें, निबिड अंधकारानें त्याला व्यापिलें. १३
परमेश्वर अब्रामास म्हणाला, हें निश्चयें जाण कीं तुझें संतान
स्वतांचा नव्हे अशा देशांत उपरी होऊन राहील व
तेथल्या लोकांचें दास्य करील, आणि ते लोक चारशें
वर्षे त्याला छळितील; १४ मग ज्या राष्ट्राचें दास्य ते
करितील त्याचें मी पारिपत्य करीन; त्यानंतर ते
बहुत धन घेऊन तेथून निघतील. १५ तूं तर शांतीनें
आपल्या पितरांकडे जाशील; चांगला म्हातारा झाल्या-
वर तुला मूठमाती देतील. १६ तुझ्या चौथ्या पिढीचे
लोक इकडे माघारे येतील, कारण अमोरी लोकांच्या
पापाचा घडा अद्यापि भरला नाहीं. १७ नंतर सूर्य
मावळला व निबिड अंधकार पडला तेव्हां असें झालें
कीं धुमसती आगटी व आगीचा जाळ हा त्या शवांच्या
तुकड्यांमधून जातांना दिसला. १८ त्या दिवशीं पर-
मेश्वरानें अब्रामाशीं करार करून सांगितलें, मिसरा-
च्या नदीपासून ते महानद फरात येथवरचा मुलूख मी
तुझ्या संततीस देतों; १९ केनी, कनिज्जी, कदमोनी,
२० हित्ती, परिज्जी, रफाईम, २१ अमोरी, कनानी,
गिर्गाशी व यबूसी या लोकांचा मुलूख मी तुला देतों.

१६ १ अब्रामाची बायको साराय हिजपासून
त्याला कांहीं मूलबाळ झालें नाहीं; तिची एक
मिसरी दासी होती, तिचें नांव हागार असें होतें.
२ साराय अब्रामाला म्हणाली, पाहा, परमेश्वरानें
माझी कूस बंद ठेविली आहे; तर माझ्या दासीपाशीं
जा; कदाचित् तिजकडून माझें घर नांदतें होईल.
तेव्हां अब्रामानें साराय हिचा शब्द मान्य केला.
३ अब्रामाला कनान देशांत राहून दहा वर्षें झाल्यावर
त्याची बायको साराय हिनें आपली मिसरी दासी हागार हिला

आपला नवरा अब्राम यानें बायको करावी म्हणून
त्याला नेऊन दिली. ४ तो हागारेपाशीं गेला व ती
गर्भवती झाली; आपण गर्भवती झालों हें पाहून तिला
आपली धनीण तुच्छ वाटूं लागली. ५ तेव्हां साराय
अब्रामाला म्हणाली, माझ्या अपमानाचा दोष आपल्या
माथीं; मीं आपली दासी तुम्हांला अंगीकारावयास दिली,
पण आपण गर्भवती आहों असें पाहून ती मला तुच्छ
लेखूं लागली आहे, परमेश्वर आपणां दोघांचा न्याय
करो. ६ अब्राम सारायेला म्हणाला, पाहा, तुझी
दासी तुझ्या हातीं आहे, तुला बरें दिसेल तें
तिचें कर. मग साराय तिला जाच करूं लागली,
तेव्हां ती तिला सोडून पळून गेली.

७ रानांत शूरच्या वाटेवर एक झरा लागतो, त्या झऱ्या-
पाशीं परमेश्वराच्या दूताला ती आढळली. ८ तो म्हणाला,
अगे सारायेचे दासी हागारे, तूं आलीस कोठून व जातेस
कोठें? ती म्हणाली, माझी धनीण साराय हिला सोडून
मी पळून जात आहें. ९ परमेश्वराचा दूत तिला म्हणाला,
तूं आपल्या धनिणीकडे परत जा आणि तिच्या
हाताखालीं तिचें सोशीत राहा. १० परमेश्वराचा दूत
तिला म्हणाला, तुझी संतति मी वाढवीनच वाढवीन,
एवढी कीं तिची गणती करतां येणार नाहीं. ११ पर-
मेश्वराचा दूत तिला आणखी म्हणाला, पाहा, तूं गर्भ-
वती आहेस; तुला पुत्र होईल त्याचें नांव इश्माएल
ठेव, कारण परमेश्वरानें तुझ्या शोकवाणीला कान दिला
आहे. १२ तो रानगाढवासारखा मनुष्य होईल;
त्याचा हात सर्वांवर चालेल व सर्वांचा हात त्याजवर
चालेल; तो आपल्या सर्व भाऊबंदांच्या देखत पूर्वेस
वस्ती करील. १३ तिजशीं बोलणाऱ्या परमेश्वराचें
नांव तिनें आत्ता-एल-रोई ( तूं पाहणारा देव ) असें
ठेविलें; ती म्हणाली, मला पाहणाराला मीं अशा
ठिकाणींहि मागून पाहिलें काय? १४ त्यावरून त्या
विहिरीचें नांव बैर-लहाय-रोई ( मला पाहणाऱ्या जीवंत
देवाची विहीर ) असें पडलें; कादेश व बेरेद यांच्या
दरम्यान ही विहीर आहे.

१५ हागारेला अब्रामापासून पुत्र झाला; हागारेपासून
झालेल्या आपल्या पुत्राचें नांव अब्रामानें इश्माएल ठेविलें.
१६ हागारेला अब्रामापासून इश्माएल झाला तेव्हां
अब्राम शायशीं वर्षांचा होता.

१ अब्राम नव्याण्णव वर्षांचा झाला तेव्हां पर-
**१७** मेश्वर त्याला दर्शन देऊन म्हणाला, मी सर्वसमर्थ
देव आहें; तूं माझ्यासमोर आहेस हें मनांत
वागवून चाल व सात्विक राहा. २ तुझ्यामाझ्यामध्यें
मी आपला करार स्थापितों; तुझा मी अपरिमित विस्तार
करीन. ३ तेव्हां अब्रामानें दंडवत घातलें, आणि
देव त्याजशीं बोलला; तो म्हणाला: ४ पाहा, मीं तर
तुजशीं करार केलाच आहे; तूं राष्ट्रसमूहाचा जनक
होणार. ५ यापुढें तुझें अब्राम हें नांव घेणार नाहींत,
तुझें नांव अब्राहाम असें घेतील, कारण मीं तुला
राष्ट्रसमूहाचा जनक केलें आहे. ६ मी तुला अत्यंत
फलसंपन्न करीन; तुजपासून मी राष्ट्रें निर्माण करीन;
तुजपासून राजे उत्पन्न होतील. ७ मी तुझा व तुझ्या-
मागें तुझ्या संतानाचा देव राहीन, असा निरंतरचा
करार मी तुजशीं आणि तुझ्या पश्चात् तुझ्या संतानाशीं
पिढ्यानपिढ्या करितों. ८ ह्या कनान देशांत तूं
उपरी आहेस; हा सगळा देश मी तुला व तुझ्या पश्चात्
तुझ्या संतानाला कायमचा वतन म्हणून देईन आणि
मी त्यांचा देव राहीन. ९ देव अब्राहामास आणखी
म्हणाला, आतां तूं आणि तुझ्या पश्चात् तुझ्या संततीनें
पिढ्यानपिढ्या माझा करार पाळावा. १० माझ्यामध्यें
आणि तूं व तुझ्या पश्चात् तुझी संतति यांच्यामध्यें
स्थापिलेला माझा करार जो तुम्हीं पाळावयाचा तो हाच
कीं तुमच्यांतील प्रत्येक पुरुषाची सुंता व्हावी.
११ तुम्हीं आपली सुंता करावी; ही माझ्या व तुमच्या-
मध्यें झालेल्या कराराची खूण होईल. १२ पिढ्यान-
पिढ्या प्रत्येक पुरुष आठ दिवसांचा झाला कीं त्याची
सुंता व्हावी, मग तो तुमच्या घरीं जन्मलेला असो
अथवा परक्यांपासून पैका देऊन घेतलेला असो;
१३ तुझ्या घरीं जन्म पावलेल्याची व तूं पैका देऊन
घेतलेल्याची सुंता अवश्य व्हावी; म्हणजे ज्याची खूण
तुमच्या देहांत केलेली आहे तो माझा करार सर्वकाळ

राहील. १४ कोणी बेसुंती राहिला, म्हणजे कोणा
पुरुषाची सुंता झाली नाहीं, तर त्याचा स्वजनांतून
उच्छेद व्हावा; त्यानें माझा करार मोडिला असें होईल.
१५ मग देवानें अब्राहामास सांगितलें, तुझी
बायको साराय हिला यापुढें साराय म्हणावयाचें नाहीं, तर
तिचें नांव सारा ( राणी ) होईल. १६ मी तिला धन्य
करीन, एवढेंच नव्हे तर तिच्या पोटीं तुला एक पुत्र
देईन; मी तिला धन्य करीन, तिच्यापासून राष्ट्रें
उद्भवतील, तिच्यापासून राष्ट्रांचे राजे निपजतील.
१७ अब्राहामानें दंडवत घातलें व हसून मनांतल्या
मनांत म्हटलें, शंभर वर्षांच्या वयांत मला मूल होईल?
नव्वद वर्षांची सारा पुत्रवती होईल? १८ अब्रा-
हाम देवाला म्हणाला, इश्माएल तुझ्यासमोर नांदो
म्हणजे पुरें. १९ मग देव म्हणाला, नाहीं, नाहीं; तुझी
बायको सारा हिच्याच पोटीं तुला पुत्र होईल; तूं
त्याचें नांव इसहाक ठेव; त्याच्या पश्चात् त्याच्या संतती-
शीं सर्वकाळ राहावा असा करार मी त्याच्याशीं
करीन. २० इश्माएलाविषयीं म्हणशील तर मीं तुझी
विनवणी ऐकली आहे; पाहा, मी त्याचें कल्याण
करीन; त्याला सफळ व बहुगुणित करीन; त्याच्या
पोटीं बारा सरदार निपजतील; मी त्याचें मोठें राष्ट्र
करीन. २१ पण पुढल्या वर्षी याच वेळीं तुला
सारेच्या पोटीं इसहाक होईल; त्याच्याशींच मी
आपला करार स्थापीन. २२ मग बोलणें संपल्यावर
देव अब्राहामाला सोडून वर गेला.
२३ तेव्हां अब्राहामानें आपला पुत्र इश्माएल, आपल्या
घरीं जन्मलेले व विकत घेतलेले आपले सर्व दास यांस
म्हणजे आपल्या घरच्या सर्व पुरुषांस आणून देवानें
त्यास सांगितलें होतें त्याप्रमाणें त्याच दिवशीं त्यांची सुंता
केली. २४ अब्राहामाची सुंता झाली तेव्हां तो
नव्याण्णव वर्षांचा होता. २५ त्याचा पुत्र इश्माएल
याची सुंता झाली तेव्हां तो तेरा वर्षांचा होता.
२६ अब्राहाम आणि त्याचा पुत्र इश्माएल यांची एकाच
दिवशीं सुंता झाली. २७ आणि त्याच्या घरीं जन्मलेले
व परक्यापासून विकत घेतलेले असे त्याच्या घरचे
सगळे पुरुष यांचीहि त्याच्याबरोबर सुंता झाली.

१८

१ तो दुपारच्या उनाच्या वेळीं डेऱ्याच्या
दाराशीं बसला असतां परमेश्वरानें मम्रेच्या एलोन
राईंत त्याला दर्शन दिलें; २ त्यानें आपली दृष्टि वर
करून पाहिलें कीं, आपल्यासमोर तीन पुरुष उभे आहेत;
त्यांस पाहून त्यानें आपल्या डेऱ्याच्या दारापासून धावत
सामोरें जाऊन जमिनीपर्यंत लवून त्यांस नमन केलें;
३ तो म्हणाला, हे प्रभू, मजवर तुझी कृपादृष्टि असेल
तर ये; तुझ्या दासापासून पुढें जाऊं नको; ४ थोडें
पाणी आणूं द्या; तुम्ही आपले पाय धुऊन या झाडा-
खालीं टेका; ५ मी थोडी भाकर आणितों तिचा आपल्या
जीवास आधार करा, मग पुढें जा; यासाठींच तुमचें या
आपल्या दासाकडे येणें झालें असावें. ते म्हणाले, तूं
म्हणतोस तें कर. ६ तेव्हां अब्राहाम त्वरेनें तंबूंत
सारेकडे जाऊन म्हणाला, तीन मापें सपीठ लौकर
तयार कर व तें मळून त्याच्या भाकरी कर. ७ अब्रा-
हामानें गुरांकडे धावत जाऊन एक चांगलें कोवळें
वासरूं निवडून चाकराकडे दिलें; त्यानें तें त्वरेनें
रांधिलें. ८ नंतर अब्राहामानें लोणी, दूध व तें
रांधलेलें वासरूं हीं आणून त्यांच्यापुढें ठेविलीं, आणि ते
जेवीत असतां तो त्यांच्याजवळ झाडाखालीं उभा राहिला.
९ मग ते त्याला म्हणाले, तुझी बायको सारा
कोठें आहे? तो म्हणाला, ती पाहा तंबूंत आहे.
१० मग तो म्हणाला, पुढल्या वसंतऋतूंत मी तुजकडे
परत येईनच येईन; पाहा, त्या समयीं तुझी बायको
सारा पुत्रवती होईल. त्याच्यामागें डेऱ्याच्या दारीं
सारा हें ऐकत होती. ११ अब्राहाम व सारा हीं
म्हातारीं, वयातीत होतीं आणि स्त्रियांच्या रीतीप्रमाणें
सारेला पाळी येण्याचें बंद झालें होतें. १२ तेव्हां सारा
हसून मनांतल्या मनांत म्हणाली, मी जरठ झालें आहें
व माझा धनीहि वृद्ध झाला आहे, तर मला आतां
हा सुखानुभव घडेल काय? १३ परमेश्वर अब्राहामास
म्हणाला, सारा कां हसली? मी आतां अशी वृद्ध झालें
असतां मला खरोखर पुत्र होणार काय असें ती
कां म्हणाली? १४ परमेश्वराला कांहीं असाध्य आहे

काय? वसंतऋतु पुनरपि आला म्हणजे मी नेमिलेल्या
समयीं परत येईन तेव्हां सारा पुत्रवती होईल.
१५ तेव्हां सारा नाकबूल करून म्हणाली, मी हसलें
नाहीं; कारण ती भयभीत झाली होती; तो म्हणाला,
नाहीं, तूं हसलीसच.

१६ नंतर ते पुरुष तेथून उठून सदोम नगराकडे
तोंड करून चालले आणि अब्राहाम त्यांस बोळवीत
गेला. १७ परमेश्वर म्हणाला, मी जें करणार तें
अब्राहामापासून लपवूं काय? १८ कारण त्याचें मोठें व
समर्थ राष्ट्र निश्चयें होणार, आणि त्याच्या द्वारें पृथ्वी-
वरील सर्व राष्ट्रें धन्य होणार. १९ मीं त्याच्याशीं परिचय
केला आहे तो अशासाठीं कीं त्यानें आपल्या लेंकरांस,
व आपल्या पश्चात् आपल्या घराण्यास परमेश्वराच्या
मार्गाला लावून न्यायनीतीचें आचरण करावयाची
आज्ञा द्यावी, आणि परमेश्वर अब्राहामाविषयीं जें
बोलला तें त्यास प्राप्त करून द्यावें. २० मग परमेश्वर
म्हणाला, सदोम व गमोरा यांचा बोभाटा फार झाला
आहे व त्यांचें पाप फार भारी आहे, २१ म्हणून
त्यांच्या पातकांचा बोभाटा माझ्या कानीं आला
आहे, तशीच त्यांची करणी आहे कीं काय हें पाहावयास
मी खालीं जातों; तसें नसेल तर मला कळून येईल.

२२ तेथून ते पुरुष वळून सदोमाकडे चालते
झाले; पण अब्राहाम तसाच परमेश्वरासमोर उभा होता.
२३ अब्राहाम जवळ जाऊन म्हणाला, तूं दुर्जनाबरोबर
धार्मिकाचाहि संहार खराच करणार काय? २४ त्या
नगरांत पन्नास धार्मिक असले तर त्यांचा तूं खास
संहार करणार काय? त्यांच्यांतल्या पन्नास धार्मिकांसाठीं
त्या नगराची तूं गय करणार नाहीं काय? २५ या
प्रकारची कृति तुजपासून दूर राहो. धार्मिकाची आणि
दुष्टाची सारखीच गति होई असा दुर्जनाबरोबर सज्ज-
नाचा वध करणें तुजपासून दूर राहो; सर्व जगाचा
नियंता न्याय करणार नाहीं काय? २६ परमेश्वर
म्हणाला, मला सदोम नगरांत पन्नास धार्मिक आढळले
तर त्यांच्याकारणें मी त्या सगळ्या स्थलाची गय
करीन. २७ अब्राहाम म्हणाला, पाहा, मी केवळ धूळ
व राख असून प्रभूशीं बोलण्याचा हिय्या करीत आहें;
२८ कदाचित् पन्नासांला पांच उणे धार्मिक असले तर
पांच उणे म्हणून तूं सर्व नगराचा नाश करिशील काय?
तेव्हां तो म्हणाला, मला तेथें पंचेचाळीस आढळले तर
मी त्याचा नाश करणार नाहीं. २९ त्यानें आपला आग्रह
पुढें चालवून पुन: म्हटलें, तेथें कदाचित् चाळीसच आढ-
ळले तर? तो म्हणाला, चाळीस आढळले तर त्या
चाळिसांकरितां तसें करणार नाहीं. ३० मग तो
म्हणाला, मी बोलतों याचा प्रभूला राग न यावा, तेथें
कदाचित् तीसच आढळले तर? तो म्हणाला, मला तीसच
आढळले तर मी तसें करणार नाहीं. ३१ मग तो
म्हणाला, पाहा, मी प्रभूशीं बोलण्याचा हिय्या करीत
आहें; तेथें वीसच आढळले तर? तो म्हणाला, वीस
आढळले तर त्या विसांकरितां मी त्याचा नाश करणार
नाहीं. ३२ तो म्हणाला, प्रभूला राग न यावा; मी आणखी
एकदा बोलतों; तेथें दहाच आढळले तर? तो म्हणाला,
दहा आढळले तर मी त्या दहांकरितां त्याचा नाश करणार
नाहीं. ३३ मग अब्राहामाशीं संभाषण समाप्त होतांच
परमेश्वर निघून गेला, आणि अब्राहाम आपल्या स्थानीं
परत आला.

१९ १ मग संध्याकाळीं ते दोघे दूत सदोमास
आले, तेव्हां लोट सदोमाच्या वेशींत बसला
होता; त्यांस पाहून लोट उठून सामोरा गेला,
आणि भूमीपर्यंत लवून त्यानें त्यांस प्रणाम केला;
२ तो त्यांस म्हणाला, पाहा, महाराज, आपल्या
दासाच्या घरीं येण्याची कृपा करा; आजची रात्र रहा,
पाय धुवा व सकाळीं उठून मार्गस्थ व्हा; पण ते
म्हणाले, नाहीं, आम्ही रात्रभर रस्त्यांतच मुक्काम करूं;
३ पण त्यानें त्यांस फारच आग्रह केल्यावरून ते
त्याच्याबरोबर त्याच्या घरीं गेले; त्यानें त्यांच्यासाठीं
भोजन तयार केलें; त्यानें बेखमीर पोळ्या केल्या
आणि ते जेवले. ४ ते निजावयास जाण्यापूर्वीच त्या
सदोम नगरांतल्या लोकांनीं, आबालवृद्धांनीं चोहोंकडून
येऊन तें घर वेढिलें. ५ ते लोटास हाक मारून
म्हणाले, आज रात्रीं तुजकडे आलेले पुरुष कोठें

आहेत? त्यांना बाहेर आण, म्हणजे आम्ही त्यांशीं समा-
गम करूं. ६ तेव्हां लोट दाराशीं त्यांजकडे गेला व त्यानें
आपल्यामागून कवाड लावून घेतलें. ७ तो म्हणाला,
बांधवहो, असलें दुष्कर्म करूं नका. ८ पाहा, माझ्या
दोन मुली आहेत, त्यांनीं अद्यापि पुरुष पाहिलेला नाहीं;
मी त्यांना तुम्हांकडे आणूं काय? तुमच्या नजरेस येईल
तसें त्यांजशीं वर्तन करा, पण ह्या पुरुषांस कांहीं करूं
नका, कां तर त्यांस आसरा व्हावा म्हणूनच ते माझ्या
छपराखालीं आले आहेत. ९ तेव्हां ते म्हणाले,
बाजूला सर. हा येथें थोडे दिवस राहावयास आला तो
आतां मोठा न्यायाधीश बनला आहे! तर त्यांच्यापेक्षां
तुझीच अधिक खबर घेतों. असें म्हणून ते लोटास
जोरानें ढकलूं लागले व कवाड फोडावयास गेले,
१० तों त्या पुरुषांनीं बाहेर हात काढून लोटास आंत
ओढून कवाड लावून घेतलें, ११ आणि घराच्या दाराशीं
जीं लहानथोर मनुष्यें जमलीं होतीं त्यांस त्यांनीं आंधळें
करून सोडिलें; मग तीं दार शोधून शोधून थकलीं.

१२ ते पुरुष लोटास म्हणाले, तुझीं आणखी
येथें कोणी आहेत काय? तुझा जांवई, तुझे पुत्र, तुझ्या
कन्या आणि तुझें दुसरें कोणी या नगरांत असेल
त्यांस या स्थानांतून बाहेर काढ. १३ कारण आम्ही या
स्थानाचा नाश करणार आहों. या लोकांचा परमेश्वरा-
पुढें फार बोभाटा झाला आहे आणि या नगराचा नाश
करण्यास परमेश्वरानें आम्हांस पाठविलें आहे.
१४ तेव्हां लोट बाहेर जाऊन आपल्या कन्यांशीं
विवाह केलेल्या आपल्या जांवयांस म्हणाला, उठा, या
स्थानांतून बाहेर पडा, कारण परमेश्वर या नगराचा
नाश करणार आहे; परंतु त्याच्या जांवयांस तो केवळ
विनोद करीत आहेसें भासलें. १५ पहाट होतांच
दूतांनीं लोटाला घाई करून म्हटलें, ऊठ, तुझी बायको
व येथें असलेल्या तुझ्या दोन मुली यांस घेऊन नीघ,
नाहीं तर या नगराच्या पातकांत तूं भस्म होशील;
१६ पण तो दिरंगाई करूं लागला, तेव्हां परमेश्वराची
करुणा त्याजवर होती म्हणून त्या पुरुषांनीं त्याचा,
त्याच्या बायकोचा आणि त्याच्या दोघी कन्यांचा हात
धरून त्यांस ओढून बाहेर काढिलें आणि नगराबाहेर
आणून सोडिलें. १७ त्यांस बाहेर आणिल्यावर दूत
त्यास म्हणाला, आपला जीव घेऊन पळ; मागें पाहूं
नको व तळवटींत कोठें थांबूं नको; डोंगराकडे पळ
काढ, नाहीं तर तूं भस्म होशील. १८ तेव्हां लोट
त्यांस म्हणाला, हे प्रभू, नको! नको! १९ पाहा,
ह्या तुझ्या दासावर तुझी कृपादृष्टि झाली आहे; माझा
जीव वांचविला ही तुझी मजवर अपार दया झाली
आहे; मला डोंगराकडे पळून जाववणार नाहीं; न जाणों,
मजवर हें अरिष्ट येऊन मी मरून जाईन. २० तर
पाहा, पळून जाण्यास हें नगर जवळ असून लहान
आहे; तें किती लहान आहे पाहा; तिकडे मला पळून
जाऊं दे, म्हणजे माझा जीव वांचेल. २१ तेव्हां तो
त्याला म्हणाला, पाहा, तुझ्या याहि गोष्टीला मी मान्य
आहें; तूं म्हणतोस त्या नगराचा मी नाश करणार नाहीं.
२२ त्वरा कर, तिकडे पळून जा; कारण तूं तेथें जाऊन
पोहंचेपर्यंत मला कांहीं करितां येत नाहीं. यावरून
त्या नगराचें नांव सोअर (लहान) असें पडलें.

२३ लोट सोअरांत जाऊन पोहंचतो तों
पृथ्वीवर सूर्योदय झाला. २४ तेव्हां परमेश्वरानें
सदोम व गमोरा यांवर गंधक व अग्नि यांचा वर्षाव
आकाशांतून केला; २५ आणि तीं नगरें आणि ती
सर्व तळवट, त्या नगरांतले सर्व रहिवासी आणि तेथें
जमिनींत उगवलेलें सर्व कांहीं यांचा त्यानें विध्वंस केला;
२६ पण लोटाची बायको त्याच्यामागून चालली होती
ती मागें पाहत राहिली तों ती मिठाचा खांब झाली.
२७ इकडे अब्राहाम मोठ्या पहाटेस उठून, परमे-
श्वरापुढें तो उभा राहिला होता त्या ठिकाणीं गेला.
२८ त्यानें सदोम व गमोरा आणि अवघा तळवटीचा
प्रदेश यांजकडे नजर फेकिली तों पाहा! त्या प्रदेशांतून
अव्याच्या धुरासारखा धूर वर चालला होता.

२९ या प्रकारें देवानें त्या तळवटींतील नगरांचा
नाश केला त्या वेळीं देवानें अब्राहामाची आठवण
केली, आणि लोट राहत होता तेथल्या नगरांचा विध्वंस
करितेवेळीं लोटाला त्या प्रलयांतून बाहेर काढिलें.

३० नंतर लोट आपल्या दोघी कन्यांसहवर्तमान
सोअरांतून निघून डोंगरावर जाऊन राहिला; त्याला
सोअरांत राहण्यास भीति वाटली, आणि तो आपल्या
दोघी कन्यांसहवर्तमान एका गुहेंत राहिला. ३१ एके
दिवशीं वडील कन्या धाकटीस म्हणाली, आपला बाप
म्हातारा आहे, आणि जगाच्या रीतीप्रमाणें आपल्याशीं
येण्यास कोणी पुरुष पृथ्वीवर नाहीं; ३२ तर चल,
आपण आपल्या बापास द्राक्षारस पाजूं आणि त्याज-
पाशीं निजूं; अशा प्रकारें आपल्या बापाचा वंश
चालवूं. ३३ त्यांनीं त्या रात्रीं आपल्या बापास द्राक्षा-
रस पाजिला आणि वडील कन्या त्याजपाशीं जाऊन
निजली; पण ती केव्हां निजली व केव्हां उठली हें
त्याला कळलें नाहीं. ३४ मग दुसऱ्या दिवशीं वडील
धाकटीस म्हणाली, पाहा, काल रात्रीं मी बापापाशीं
निजलें; तर आज रात्रींहि आपण त्याला द्राक्षारस
पाजूं आणि तूं त्याजपाशीं जाऊन नीज; अशा रीतीनें
आपण आपल्या बापाचा वंश चालवूं. ३५ त्या
रात्रींहि त्यांनीं बापास द्राक्षारस पाजिला आणि धाकटी
उठून जाऊन त्याजपाशीं निजली; पण ती केव्हां निजली
व केव्हां उठली हें त्याला कळलें नाहीं. ३६ या प्रकारें
लोटाच्या दोघी कन्या बापापासून गर्भवती झाल्या.
३७ वडील कन्येस पुत्र झाला, त्याचें नांव मवाब असें
ठेविलें; आजमितीला जे मवाबी म्हणून आहेत त्यांचा
हा मूळपुरुष. ३८ धाकटीसहि पुत्र झाला, त्याचें
नांव बेनअम्मी असें ठेविलें; आजमितीला जे अम्मोनी
म्हणून आहेत त्यांचा हा मूळपुरुष.

२० १ अब्राहामानें तेथून दक्षिण प्रांताकडे प्रवास
करून कादेश व शूर यांच्या दरम्यान मुक्काम
केला आणि कांहीं दिवस गरार येथें वस्ती केली.
२ आपली बायको सारा ही आपली बहीण आहे असें
अब्राहाम सांगूं लागला तेव्हां गराराचा राजा अबी-
मलेख यानें माणसें पाठवून सारेला आणविलें. ३ देव
रात्रीं स्वप्नांत येऊन अबीमलेखाला म्हणाला, तूं ही जी
स्त्री हरण केली आहेस तिजमुळें तुझा अंत झालाच
म्हणून समज, कारण ती नवऱ्याची बायको आहे.
४ अबीमलेख कांहीं तिजपाशीं गेला नव्हता, म्हणून तो
म्हणाला, प्रभू, तूं धार्मिक लोकांचाहि संहार करणार
काय ? ५ ती माझी बहीण आहे असें तो मला म्हणाला
नाहीं काय ? तसेंच तो माझा भाऊ आहे असें तीहि
म्हणाली नाहीं काय ? मीं सात्विक मनानें व निर्मळ
हातांनीं हें केलें आहे. ६ देवानें त्याला स्वप्नांत म्हटलें,
तूं सात्विक मनानें हें केलें हें मलाहि ठाऊक आहे, आणि
मजविरुद्ध तुजकडून पाप घडूं नये म्हणून मीं तुला
आवरिलेंहि; यास्तव मीं तुला तिला स्पर्श करूं दिला
नाहीं. ७ आतां त्या मनुष्याची बायको त्याला परत दे,
कां कीं तो संदेष्टा आहे; तो तुजसाठीं प्रार्थना करील
आणि तूं वांचशील; पण जर तूं तिला परत दिलें नाहीं,
तर तूं व तुझें सर्वस्व यांचा खास अंत होईल हें जाण.
८ मग अबीमलेखानें मोठ्या पहाटेस उठून
आपल्या सर्व सेवकांस बोलावून या सर्व गोष्टी
त्यांना ऐकविल्या; तेव्हां तीं माणसें फार घाबरलीं.
९ अबीमलेखानें अब्राहामास बोलावून आणून
म्हटलें, तूं आम्हांला हें काय केलें ? मीं तुझा असा
कोणता अपराध केला कीं तूं मजवर व माझ्या
राज्यावर असें महापातक आणिलें ? करूं नये असें
वर्तन तूं मजशीं केलें. १० अबीमलेख अब्राहामास
आणखी म्हणाला, तूं काय पाहून ही गोष्ट केली ?
११ अब्राहाम म्हणाला, या ठिकाणीं देवाचें भय अगदीं
नाहीं, म्हणून हे लोक माझ्या बायकोसाठीं माझा घात
करितील असें मला वाटलें. १२ शिवाय ती खरोखर
माझी बहीण लागते, म्हणजे ती माझ्या बापाची कन्या;
पण माझ्या आईची ती कन्या नव्हे म्हणून ती माझी
बायको झाली. १३ देवानें मला माझ्या बापाचें घर
सोडून भ्रमण करावयास लाविलें तेव्हां मी तिला
म्हणालों, मजवर एवढी कृपा कर कीं आपण जिकडे
जाऊं तिकडे हा माझा भाऊ आहे असें सांग. १४ मग
अबीमलेखानें मेंढरें, बैल, दास व दासी हीं आणून
अब्राहामास दिलीं आणि त्याची बायको साराहि
त्याची त्याला परत दिली. १५ अबीमलेख म्हणाला,
पाहा, माझा देश तुला मोकळा आहे; तुला वाटेल तेथें

राहा. १६ तो सारेला म्हणाला, पाहा, मी तुझ्या
भावास रुप्याच्या हजार मुद्रा देत आहें; त्यांच्या
योगें तुझ्याबरोबरच्या सगळ्या लोकांची डोळेझाक
होईल. या प्रकारें सर्वांसमोर तुझा उजळ माथा झाला
आहे. १७ मग अब्राहामानें देवाची प्रार्थना केली,
तेव्हां देवानें अबीमलेख, त्याची बायको व त्याच्या
दासी यांस बरें केलें, आणि त्यांस मुलें होऊं लागलीं.
१८ कारण अब्राहामाची बायको सारा हिजमुळें परमे-
श्वरानें अबीमलेखाच्या घराण्यांतल्या सर्व स्त्रियांचे
गर्भाशय अगदीं बंद केले होते.

२१ १ यानंतर परमेश्वरानें आपल्या म्हणण्या-
प्रमाणें सारेवर अनुग्रह केला आणि तिला
दिलेलें वचन पुरें केलें. २ सारा गर्भवती
झाली; देवानें सांगितलेल्या समयीं अब्राहामाला
म्हातारपणीं तिजपासून पुत्र झाला. ३ अब्राहामाला
सारेपासून पुत्र झाला त्याचें नांव त्यानें इसहाक ठेविलें.
४ अब्राहामानें आपला पुत्र इसहाक आठ दिवसांचा
झाला तेव्हां देवाच्या आज्ञेप्रमाणें त्याची सुंता केली.
५ इसहाक झाला तेव्हां अब्राहाम शंभर वर्षांचा होता.
६ सारा म्हणाली, देवानें मला हसविलें आहे; जो
कोणी हें ऐकेल तो माझ्याबरोबर हसेल. ७ ती आणखी
म्हणाली, सारा मुलांस स्तन पाजील असें अब्राहामास
कोण म्हणाला असता? पाहा, त्याच्या म्हातारपणीं
मजपासून त्याला पुत्र झाला आहे!

८ तो बाळ मोठा झाला तेव्हां त्याची थानमोड केली;
इसहाकाची थानमोड झाली तेव्हां अब्राहामानें मोठी
मेजवानी दिली. ९ हागार मिसरिणीस अब्राहामा-
पासून झालेल्या पुत्राला खिदळतांना सारेनें पाहिलें.
१० तेव्हां ती अब्राहामास म्हणाली, या दासीस व
हिच्या पुत्रास घालवून द्या; माझा पुत्र इसहाक याज-
बरोबर या दासीचा पुत्र वारस नसावा. ११ अब्रा-
हामास आपल्या पुत्रास्तव ही गोष्ट फार वाईट वाटली.
१२ तेव्हां देव अब्राहामास म्हणाला, तुझा पुत्र व
तुझी दासी यांकरितां तुला ही गोष्ट वाईट न वाटावी;
सारा तुला जें कांहीं सांगते तें सगळें ऐक; कारण
तुझ्या वंशाचें नांव इसहाकद्वारे चालविणार. १३ या
दासीच्या पुत्रापासूनहि मी एक राष्ट्र निर्माण करीन;
कारण तो तुझें बीज आहे. १४ नंतर अब्राहामानें
मोठ्या पहाटेस उठून भाकरी व पाण्याची मसक
आणून हागारेच्या खांद्यावर ठेविली आणि तिचा मुलगा
तिच्या हवालीं करून तिला रवाना केलें; ती निघून
बैर-शेबाच्या अरण्यांत भटकत राहिली. १५ मसके-
तील पाणी संपल्यावर तिनें तें मूल एका झुडपा-
खालीं टाकिलें, १६ आणि ती बाणाच्या टप्प्याइतकी
दूर जाऊन त्याच्याकडे तोंड करून बसली; ती मनांत
म्हणाली, मीं आपल्या मुलाचा मृत्यु डोळ्यांनीं पाहूं नये;
आणि ती त्याच्याकडे तोंड करून बसून हंबरडा फोडून
रडूं लागली. १७ देवानें मुलाची दीन वाणी ऐकली व
देवाच्या दूतानें आकाशांतून हाक मारून हागारेला
म्हटलें, हागारे, तूं कष्टी कां? भिऊं नको, कारण मूल
आहे तेथून देवानें त्याची दीन वाणी ऐकली आहे.
१८ ऊठ, मुलास उचलून आपल्या हातीं घट्ट धर;
त्याच्यापासून मोठें राष्ट्र निर्माण होईल असें मी करीन.
१९ मग देवानें तिचे डोळे उघडिले व पाण्याचा झरा
तिच्या दृष्टीस पडला; तेव्हां तिनें जाऊन मसकेंत पाणी
भरिलें व मुलास पाजिलें. २० देव त्या मुलाचा पाठि-
राखा झाला व तो रानांत लहानाचा मोठा होऊन
तिरंदाज झाला. २१ तो पारानाच्या अरण्यांत वस्ती
करून राहिला, आणि त्याच्या आईनें त्याला मिसर
देशांतली बायको केली.

२२ त्या सुमारास असें झालें कीं अबीमलेख व
त्याचा सेनापति पीकोल हे अब्राहामास म्हणाले, जें
कांहीं तूं करितोस त्यांत देव तुझ्याबरोबर आहे. २३ तर
तूं मला आतां येथें देवाच्या शपथेवर असें सांग कीं मी
तुजशीं, तुझ्या पुत्रपौत्रांशीं कपट करणार नाहीं, आणि
जशी तूं मजवर कृपा केली तशी मी तुजवर व ज्या
देशांत मी उपरी होऊन राहिलों आहें त्या ह्या
देशावर कृपा करीन. २४ अब्राहाम म्हणाला,
बरें, अशी शपथ मी वाहतों. २५ मग, अबी-
मलेखाच्या चाकरांनीं पाण्याची एक विहीर जुलमानें

हस्तगत केली होती त्याबद्दल अब्राहामानें अबी-
मलेखाला दोष लाविला. २६ अबीमलेख म्हणाला,
हें कोणीं केलें हें मला ठाऊक नाहीं; तूं मला हें कधीं
सांगितलें नव्हतें; आणि मींहि हें ऐकलें नव्हतें, आजच
ऐकलें. २७ मग अब्राहामानें मेंढरें व बैल आणून
अबीमलेखास दिले आणि त्या दोघांनीं परस्परांशीं
करार केला. २८ अब्राहामानें कळपांतलीं सात कोकरें
वेगळीं काढून ठेविलीं. २९ तेव्हां अबीमलेख अब्रा-
हामास म्हणाला, तूं हीं सात कोकरें वेगळीं काढून
ठेविलीं तीं कशाला? ३० तो म्हणाला, तूं हीं सात
कोकरें माझ्या हातून घ्यावीं, म्हणजे ही विहीर मीं
खणिली आहे असें माझ्या तर्फेचें प्रमाण होईल.
३१ यावरून त्या स्थलाचें नांव त्यानें बैर-शेबा
(शपथेची विहीर) असें ठेविलें; कारण तेथें त्या दोघांनीं
शपथपूर्वक करार केला. ३२ बैर-शेबा येथें त्या
दोघांचा करार झाल्यावर अबीमलेख व त्याचा सेनापति
पीकोल हे निघून पलिष्टयांच्या देशीं परत गेले.
३३ मग अब्राहामानें बैर-शेबा येथें झाऊ नांवाचा
वृक्ष लाविला आणि तेथें सनातन देव परमेश्वर
याच्या नामानें प्रार्थना केली. ३४ अब्राहाम हा
पलिष्टयांच्या देशांत बहुत काळ उपरी म्हणून राहिला.

२२ १ या गोष्टी घडल्यावर असें झालें कीं
देवानें अब्राहामास कसोटीस लाविलें; त्यानें
अब्राहामा, अशी हाक मारिली, तेव्हां अब्राहाम
म्हणाला, काय आज्ञा? २ देव म्हणाला, तुझा पुत्र,
तुझा एकुलता एक प्रिय पुत्र इसहाक यास घेऊन मोरिया
देशांत जा आणि मी तुला सांगेन त्या डोंगरावर
त्याचें होमार्पण कर. ३ तेव्हां अब्राहामानें मोठ्या
पहाटेस उठून आपल्या गाढवावर खोगीर घातलें,
आपल्याबरोबर दोघे सेवक व आपला पुत्र इसहाक
यांस घेतलें, आणि होमार्पणासाठीं लाकडें फोडून घेतलीं.
मग देवानें सांगितलेल्या ठिकाणीं तो निघून गेला.
४ तिसरे दिवशीं अब्राहामानें डोळे वर करून ती
जागा दुरून पाहिली. ५ अब्राहाम आपल्या चाकरांस
म्हणाला, येथें गाढवापाशीं राहा, मुलगा व मी
पलीकडे जातों आणि देवाची उपासना करून परत
येतों. ६ तेव्हां अब्राहामानें होमाचीं लाकडें घेऊन
आपला पुत्र इसहाक याच्या पाठीवर ठेविलीं आणि
आपल्या हातीं विस्तव व सुरा घेतला, आणि ते दोघे
बरोबर चालले. ७ तेव्हां इसहाकानें आपला बाप
अब्राहाम यास म्हटलें, बाबा! आणि तो म्हणाला,
काय म्हणतोस बाळा? त्यानें म्हटलें, पाहा,
विस्तव व लाकडें आहेत पण होमबलीसाठीं कोकरूं
कोठें आहे? ८ त्यास अब्राहाम म्हणाला, बाळा, देव
स्वतः होमबलीसाठीं कोकरूं पाहून देईल; आणि ते
दोघे बरोबर चालले.

९ देवानें त्याला सांगितलेल्या जागीं ते आले तेव्हां
अब्राहामानें तेथें वेदी उभारिली, तिजवर लाकडें रचिलीं
आणि आपला पुत्र इसहाक यास बांधून वेदीवरच्या
लाकडांवर ठेविलें. १० मग अब्राहामानें आपला पुत्र
वधण्यासाठीं हात पुढें करून सुरा घेतला. ११ तेव्हां
परमेश्वराच्या दूतानें त्यास आकाशांतून हाक मारून म्हटलें,
अब्राहामा! अब्राहामा! तो म्हणाला, काय आज्ञा? १२
मग तो बोलला, तूं मुलावर आपला हात चालवूं नको,
त्याला कांहीं करूं नको; कारण तूं आपल्या पुत्रास, आपल्या
एकुलत्या एका पुत्रासहि मला अर्पिण्यास मागेंपुढें
पाहिलें नाहीं, यावरून तूं देवाला भिऊन चालणारा
आहेस हें मला दिसून आलें. १३ तेव्हां अब्राहामानें डोळे
वर करून पाहिलें तों आपल्यामागें झुडपांत शिंगें गुंतलेला
एक एडका त्यास दिसला; मग अब्राहामानें तो घेऊन
आपल्या पुत्राच्या ऐवजीं अर्पण केला. १४ आणि
अब्राहामानें त्या स्थानाचें नांव याव्हे-यिरे (परमेश्वर पाहून
देईल) असें ठेविलें; त्यावरून परमेश्वराच्या गिरीवर पाहून
देण्यांत येईल असें आजवर बोलतात.

१५ परमेश्वराच्या दूतानें आकाशांतून अब्राहामाला
दुसऱ्यानें हाक मारून म्हटलें, १६ परमेश्वर
म्हणतो, मी आपली शपथ वाहून सांगतों कीं
तूं हें कृत्य केलें; आपल्या पुत्रास, आपल्या
एकुलत्या एका पुत्रास मला अर्पिण्यास तूं मागेंपुढें
पाहिलें नाहीं; १७ यास्तव मी तुझें कल्याण करीनच

करीन व वृद्धिच वृद्धि करून तुझी संतति आकाशांतील
ताऱ्यांइतकी, समुद्रतीरींच्या वाळूइतकी होईल असें
करीन; तुझी संतति आपल्या शत्रूंचीं नगरें हस्तगत
करील; १८ तूं माझा शब्द ऐकला म्हणून पृथ्वीवरचीं
सर्व राष्ट्रें तुझ्या संततीच्याद्वारें अभीष्ट पावतील.
१९ मग अब्राहाम आपल्या चाकरांकडे परत आला,
आणि ते उठून त्याजबरोबर बैर-शेबा येथें गेले; आणि
अब्राहाम बैर-शेबा येथें राहिला.

२० या गोष्टी घडल्यानंतर कोणीं येऊन
अब्राहामास सांगितलें, पाहा, तुझा भाऊ नाहोर यास
मिल्केच्या पोटीं पुत्रसंतति झाली आहे. २१ ऊस हा
त्याचा ज्येष्ठ पुत्र, त्याचा भाऊ बूज व अरामाचा पूर्वज
कमुवेल, २२ आणि केसद, हजो, पिल्दाश, यिद्लाप
व बथुवेल. २३ बथुवेलास रिबका झाली; अब्राहामाचा
भाऊ नाहोर याला मिल्केच्या पोटीं हे आठ पुत्र झाले;
२४ आणि त्याची उपपत्नी रेऊमा हिला तेबाह,
गहाम, तहश व माका हीं मुलें झालीं.

२३ १ सारा एकशेसत्तावीस वर्षें जगली; एवढेंच
तिचें आयुष्य होतें. २ सारा हीं कनान देशांतील
किर्याथ-आरबा (तेंच हेब्रोन) येथें मृत्यु पावली,
आणि अब्राहाम तिजसाठीं शोक व विलाप करण्यास
तेथें आला. ३ अब्राहाम आपल्या मयताजवळून
उठून हेथींस म्हणाला, ४ मी तुमच्यामध्यें उपरी व
परदेशी आहें; माझ्या मालकीचें कबरस्तान तुमच्या-
मध्यें असावें म्हणून मला जागा द्या, म्हणजे मी आपल्या
मयतास दृष्टीआड करीन. ५ तेव्हां हेथी अब्राहामास
म्हणाले, ६ स्वामी, आमचें ऐका; आमच्यामध्यें आपण
देवाचे एक सरदार आहां; आपण आमच्या वाटेल त्या
थडग्यांत आपल्या मयतास मूठमाती द्या; आपल्या
मयतास मूठमाती देण्यासाठीं आपलें खासगीचें थडगें
देण्यास आमच्यांतला कोणीहि अनमान करणार नाहीं.
७ तेव्हां अब्राहामानें उठून त्या देशच्या लोकांस
म्हणजे हेथींस नमन केलें. ८ तो त्यांस म्हणाला, मीं
आपल्या मयतास दृष्टीआड करावें अशी तुमची इच्छा
असल्यास माझें म्हणणें ऐका: एफ्रोन बिन सोहर याज-
पाशीं रदबदली करा कीं ९ त्याच्या शेताच्या सीमेच्या
आंत असलेली त्याची मकपेला नांवाची गुहा आहे,
ती त्यानें तुमच्यामध्यें माझ्या मालकीचें कबरस्तान
व्हावें म्हणून पुरी किंमत घेऊन मला द्यावी. १० एफ्रोन
हित्ती हा हेथींमध्यें बसलेला होता, तो हेथींच्या समक्ष,
त्याच्या गांवच्या वेशींतून जाणाऱ्यायेणाऱ्या सर्वांसमक्ष,
अब्राहामास म्हणाला, ११ स्वामी, नाहीं, माझें
ऐका: तें शेत आणि त्यांत असलेली गुहा हीं माझ्या
भाऊबंदांसमक्ष मी आपणाला देतों, तेथें आपल्या मयतास
माती द्या. १२ तेव्हां अब्राहामानें त्या देशच्या लोकांस
नमन केलें, १३ आणि त्या देशच्या लोकांसमक्ष तो
एफ्रोनास म्हणाला, माझें एवढें अवश्य ऐक: मी
शेताचा पैका देतों तो मजकडून घे म्हणजे मी आपल्या
मयतास तेथें मूठमाती देईन. १४ एफ्रोनानें
अब्राहामास उत्तर केलें, १५ स्वामी, माझें ऐका:
ही अवघी चारशें शेकेल रुपें किंमतीची जमीन, तिचें
काय मोठें? आपण आपल्या मयतास मूठमाती द्या. १६
अब्राहामानें एफ्रोनाचें म्हणणें कबूल करून हेथींच्या देखत
सांगितला होता तेवढा पैका म्हणजे चलनी चारशें
शेकेल रुपें त्यास तोलून दिलें.

१७ याप्रमाणें एफ्रोनाचें शेत जें मम्रेच्यासमोर
मकपेलांत होतें तें व त्यांतील गुहा, आणि शेतांतील आणि
चतुःसीमांतील सर्व झाडेंझुडें १८ हेथींसमक्ष, वेशींतून
जाणाऱ्यायेणाऱ्या सर्वांसमक्ष, अब्राहामाच्या कबजांत पूर्ण-
पणें आलीं. १९ नंतर अब्राहामानें आपली बायको सारा
हिला कनान देशांतलें मम्रे (तेंच हेब्रोन) यासमोर
मकपेलाच्या शेतांतील गुहेंत पुरिलें; २० आणि
तें शेत गुहेसहित वंशपरंपरा कबरस्तान व्हावें म्हणून
हेथींकडून अब्राहामास प्राप्त झालें.

२४ १ अब्राहाम आतां वयोवृद्ध होऊन अगदीं
जराग्रस्त झाला; परमेश्वरानें अब्राहामाचें सर्व
बाबतींत अभीष्ट केलें होतें. २ अब्राहामाच्या
सर्वस्वाचा कारभार पाहणारा एक म्हातारा सेवक होता,
त्याला त्यानें म्हटलें, तूं आपला हात माझ्या मांडीखालीं
ठेव. ३ मी तुला परमेश्वराची, आकाश व पृथ्वी यांच्या

देवाची शपथ घालून सांगतों कीं ज्या कनानी लोकांत
मी राहत आहें त्यांच्या कन्यांतली कोणी माझ्या पुत्रास
नवरी पाहूं नको. ४ तर माझ्या देशीं माझ्या आप्तांकडे
जा आणि तेथून माझा पुत्र इसहाक याच्यासाठीं नवरी
पाहून आण. ५ त्याचा सेवक त्याला म्हणाला, यदा-
कदाचित् वधू मजबरोबर या देशांत येण्यास कबूल
झाली नाहीं तर ज्या देशांतून तूं आलास त्यांत परत
तुझ्या पुत्रास मीं घेऊन जावें काय? ६ तेव्हां अब्राहाम
त्यास म्हणाला, खबरदार, माझ्या पुत्रास तिकडे
न्यावयाचें नाहीं. ७ स्वर्गीच्या ज्या परमेश्वर देवानें मला
माझ्या बापाच्या घरांतून, माझ्या जन्मभूमींतून
आणिलें आणि मला शपथपूर्वक सांगितलें कीं
हा देश मी तुझ्या संततीला देईन, तो देव आपला दूत
पाठवील, तो तुझ्या अग्रभागीं चालेल, आणि तूं तेथूनच
माझ्या पुत्रासाठीं नवरी आण. ८ पण ती वधू
तुजबरोबर येण्यास कबूल झाली नाहीं तर तूं या माझ्या
शपथेंतून मोकळा होशील; मात्र माझ्या पुत्रास पुनरपि
तिकडे नेऊं नको. ९ तेव्हां त्या सेवकानें आपला
धनी अब्राहाम याच्या मांडीखालीं हात ठेवून त्याप्रमाणें
शपथ वाहिली. १० मग तो सेवक आपल्या धन्याच्या
उंटांपैकीं दहा उंट घेऊन निघाला; त्याच्या धन्याची सर्व
मालमत्ता त्याच्या हातीं होती; तो अराम-नहराईम
(मेसोपटेम्या) यांतील नाहोर नगरांत गेला. ११ संध्या-
काळीं स्त्रिया पाणी भरण्यास बाहेर निघतात त्या सुमारास
त्यानें नगराबाहेरील विहिरीजवळ आपले उंट बसविले,
१२ आणि तो बोलला, हे परमेश्वरा, माझा धनी अब्रा-
हाम याच्या देवा, तूं आज कृपा करून माझी कार्यसिद्धि
कर; माझा धनी अब्राहाम याजवर प्रसाद कर. १३ पाहा,
मी या पाण्याच्या विहिरीपाशीं उभा आहें, आणि नगर-
वासी कन्या पाणी भरावयास बाहेर येत आहेत. १४ तर
असें घडून येऊं दे कीं ज्या मुलीस मी म्हणेन, मला पाणी
पाजण्यासाठीं आपली घागर उतर, आणि ती मला म्हणेल,
तूं पी आणि तुझ्या उंटांसहि मी पाजितें, तीच तुझा
सेवक इसहाक याच्यासाठीं तूं नेमिलेली असो; यावरून
मला कळेल कीं तूं माझ्या धन्यावर प्रसाद केला आहे.

१५ त्याचें बोलणें संपलें नाहीं तोंच अब्राहामाचा
बंधु नाहोर याची बायको मिल्का हिचा पुत्र बथुवेल
यास झालेली रिबका खांद्यावर घागर घेऊन पुढें
आली. १६ ही मुलगी दिसावयाला फार सुंदर
होती; ती कुमारी होती; तिनें पुरुष पाहिला नव्हता;
ती विहिरींत उतरली व घागर भरून वर आली.
१७ तेव्हां तो सेवक धावत जाऊन तिला गांठून
म्हणाला, तुझ्या घागरींतलें थोडें पाणी मला पाज.
१८ ती म्हणाली, पी, बाबा; आणि तिनें तावडतोब
आपल्या हातावर घागर उतरून त्याला पाणी पाजिलें.
१९ त्याला पुरें इतकें पाणी पाजिल्यावर ती म्हणाली
मी तुझ्या उंटांसाठीं पाणी आणून त्यांस पुरें इतकें
पाजितें. २० मग तिनें त्वरा करून घागर डोणींत
रिचविली व पुनः पाणी आणावयास ती विहिरीकडे
धावत गेली; असें तिनें सर्व उंटांस पुरें इतकें
पाणी पाजिलें. २१ तेव्हां तो मनुष्य अचंबा करून
तिजकडे पाहत राहिला; परमेश्वरानें आपला प्रवास
सफळ केला किंवा कसें याचा विचार करीत तो
स्तब्ध राहिला. २२ उंटांचें पाणी पिणें झाल्यावर
त्या मनुष्यानें अर्धा शेकेल भार सोन्याची एक नथ व
तिच्या हातांत घालण्यासाठीं दहा शेकेल भार सोन्याच्या
दोन बांगड्या काढिल्या, २३ आणि तो म्हणाला, तूं
कोणाची कन्या आहेस हें मला सांग; तुझ्या बापाच्या
घरीं आम्हांस उतरावयाला जागा आहे काय? २४ ती
त्यास म्हणाली, मिल्केच्या पोटीं नाहोरास झालेल्या
बथुवेलाची मी कन्या. २५ ती आणखी त्यास म्हणाली,
आमच्या येथें पेंढा व वैरण हवी तितकी आहे, आणि
उतरावयास जागाहि आहे. २६ तेव्हां त्या मनुष्यानें
नमून परमेश्वराचें स्तवन केलें. २७ तो म्हणाला, माझा
धनी अब्राहाम याचा देव परमेश्वर धन्य आहे; त्यानें
माझ्या धन्यावर दया करण्याचें व त्याजशीं सत्यतेनें
वर्तण्याचें सोडिलें नाहीं; परमेश्वरानें मला नीट वाट
दाखवून माझ्या धन्याच्या भावाच्या घरीं पोंचविलें आहे.
२८ तेव्हां त्या मुलीनें धावत जाऊन आपल्या आईच्या
घरच्यांस ही हकीकत कळविली. २९ रिबकेला एक

भाऊ होता, त्याचें नांव लाबान असें होतें; तो विहिरी-
पाशीं त्या मनुष्याकडे धावत गेला. ३० त्यानें नथ
व आपल्या बहिणीच्या हातांतल्या बांगड्या पाहिल्या
आणि, मला तो मनुष्य असें असें म्हणाला, हे रिबकेच्या
तोंडचे शब्द ऐकले, तेव्हां तो त्या मनुष्याकडे आला
आणि पाहतो तों उंटांपाशीं विहिरीजवळ तो उभा
आहे. ३१ तेव्हां त्यानें म्हटलें, परमेश्वराचा प्रसाद
पावलेल्या, आंत ये; बाहेर कां उभा आहेस? मीं
तुझ्यासाठीं घर व तुझ्या उंटांसाठीं जागा तयार केली
आहे. ३२ मग तो मनुष्य घरांत आला; आणि लाबानानें
उंटांच्या कंठाळी सोडून त्यांस पेंढावैरण दिली, आणि
त्यास व त्याच्या बरोबरच्यांस पाय धुण्यास पाणी दिलें.

३३ त्याच्यापुढें अन्न वाढिलें तेव्हां तो म्हणाला,
मी आपलें येण्याचें प्रयोजन सांगण्याच्या आधीं जेव-
णार नाहीं. तेव्हां त्यानें म्हटलें, सांग. ३४ तो
म्हणाला, मी अब्राहामाचा सेवक आहें. ३५ परमे-
श्वरानें माझ्या धन्याचें फार कल्याण केलें आहे; तो
थोर झाला आहे; त्यानें त्याला गुरें, मेंढरें, सोनें, रुपें,
दासदासी, उंट व गाढवें हीं दिलीं आहेत. ३६ माझ्या
धन्याची बायको सारा हिला वृद्धापकाळीं त्याजपासून
पुत्र झाला, त्याला त्यानें आपलें सर्वस्व दिलें आहे.
३७ आणि माझ्या धन्यानें मला शपथ घालून सांगितलें
आहे कीं ज्या कनान्यांच्या देशांत मी राहत आहें
त्यांच्या कन्यांतली कोणी माझ्या पुत्रास नवरी करूं
नको; ३८ तर माझ्या बापाच्या घरीं माझ्या आप्तांकडे
जा आणि तेथून माझ्या पुत्रास नवरी पाहून आण.
३९ तेव्हां मीं आपल्या धन्यास म्हटलें, वधू मजबरोबर
कदाचित् येणार नाहीं. ४० तेव्हां तो मला म्हणाला,
परमेश्वर मजसमोर आहे असें समजून मी चाललों
आहें; तो आपल्या दूतास तुजबरोबर पाठवून तुझा
प्रवास सफळ करील, आणि तूं माझ्या आप्तांतून,
माझ्या पित्याच्या घराण्यांतून माझ्या पुत्रास नवरी
आण; ४१ तूं माझ्या आप्तांकडे गेलास म्हणजे माझ्या
शपथेंतून मोकळा होशील; मुलगी देण्यास ते कबूल
न झाले तर तूं माझ्या शपथेंतून मोकळा होशील-
४२ मी आज विहिरीपाशीं आलों तेव्हां
बोललों: माझा धनी अब्राहाम याच्या देवा
परमेश्वरा, मीं जो प्रवास केला आहे तो सफळ
करणार असलास तर ४३ पाहा, मी या पाण्याच्या
विहिरीपाशीं उभा आहें; तर असें घडून येवो कीं
पाणी भरण्यास जी मुलगी येईल तिला मी म्हणेन,
तुझ्या घागरींतलें थोडें पाणी मला पाज; ४४ आणि
ती मला म्हणेल, तूं पी व मी तुझ्या उंटांसहि पाणी
आणितें; तीच स्त्री परमेश्वरानें माझ्या धन्याच्या पुत्रा-
साठीं नेमिलेली आहे असें ठरो. ४५ माझ्या मनां-
तल्या मनांत हें बोलणें संपलें नाहीं तोंच रिबका
खांद्यावर घागर घेऊन तेथें आली आणि तिनें विहिरींत
उतरून पाणी भरिलें; मग मी तिला म्हणालों,
मला थोडें पाणी पाज. ४६ तिनें लागलीच आपल्या
हातावर घागर उतरून म्हटलें, तूं पी व तुझ्या उंटां-
सहि मी पाजितें. तेव्हां मी पाणी प्यालों व तिनें
उंटांसहि पाणी पाजिलें. ४७ मग मीं तिला विचारिलें,
तूं कोणाची कन्या? ती म्हणाली, नाहोरापासून मिल्केस
झालेल्या बथुवेलाची मी कन्या; तेव्हा मीं तिच्या
नाकांत नथ व हातांत बांगड्या घातल्या. ४८ मीं
मस्तक लववून परमेश्वरास नमन केलें आणि माझ्या
धन्याच्या भावाची कन्या त्याच्या पुत्रासाठीं न्यावी
म्हणून माझा धनी अब्राहाम याचा देव परमेश्वर यानें
मला नीट वाट दाखविली म्हणून मीं त्याचें स्तवन केलें.
४९ तर आतां माझ्या धन्याशीं स्नेहाचा व सत्याचा
व्यवहार करणार असलां तर तसें सांगा, नसल्यास तसें
सांगा; म्हणजे मी उजवीडावी वाट धरीन.

५० यावर लाबान व बथुवेल यांनीं उत्तर केलें, ही
गोष्ट परमेश्वराकडून आली आहे; तुला आमच्यानें
बरेंवाईट कांहीं बोलवत नाहीं. ५१ पाहा, रिबका
तुजपुढें आहे; तिला घेऊन जा; परमेश्वराच्या सांगण्या-
प्रमाणें ती तुझ्या धन्याच्या पुत्राची बायको होऊं दे.

५२ अब्राहामाच्या सेवकानें त्यांचे हे शब्द ऐकले
तेव्हां त्यानें भूमीपर्यंत लवून परमेश्वरास नमन केलें.
५३ मग त्या सेवकानें सोन्या रुप्याचे दागिने व वस्त्रें

काढून रिबकेला दिलीं आणि तिचा भाऊ व तिची
आई यांस बहुमोल चिजा दिल्या. ५४ मग त्यानें व
त्याच्या बरोबरच्या मनुष्यांनीं खाणेंपिणें करून ती रात्र
तेथें घालविली; सकाळीं उठल्यावर तो म्हणाला,
माझ्या धन्याकडे जावयाला मला निरोप द्या. ५५ हें
ऐकून तिचा भाऊ व आई हीं म्हणालीं, मुलीला
आमच्याजवळ थोडे दिवस, निदान दहा दिवस, राहूं द्या;
मग ती येईल; ५६ पण तो त्यांना म्हणाला, परमेश्वरानें
माझा प्रवास सफळ केला आहे, तर मला ठेवून घेऊं
नका; मला निरोप द्या, मला आपल्या धन्याकडे जाऊं
द्या. ५७ तेव्हां ते म्हणाले, आम्ही मुलीस बोलावून ती
काय म्हणते तें विचारूं. ५८ त्यांनीं रिबकेस बोलावून
विचारिलें, तूं या मनुष्याबरोबर जातेस काय? ती
म्हणाली, जातें. ५९ मग त्यांनीं आपली बहीण रिबका,
तिची दाई, अब्राहामाचा सेवक व त्याचीं माणसें यांची
रवानगी केली. ६० त्यांनीं रिबकेला आशीर्वाद
देऊन म्हटलें, बाईगे, तूं सहस्रावधींची, लक्षावधींची
जननी हो, व तुझी संतति आपल्या वैऱ्यांच्या
नगरांची सत्ता पावो. ६१ मग रिबका व तिच्या सख्या
उठल्या आणि उंटांवर बसून त्या मनुष्याच्या मागून
गेल्या; याप्रमाणें तो रिबकेस घेऊन गेला.

६२ इकडे इसहाक लहाय-रोई विहिरीकडून आला
होता; तो दक्षिण प्रांतीं राहत असे. ६३ इसहाक हा संध्या-
काळच्या वेळीं ध्यान करावयास रानांत गेला असतां त्यानें
नजर वर करून पाहिलें तों त्याला उंट येतांना दिसले.
६४ रिबकेनें डोळे वर करून इसहाकाला पाहिलें तेव्हां
ती उंटावरून उतरली. ६५ तिनें त्या सेवकास विचा-
रिलें, हा रानांत आपणांस सामोरा येत आहे तो कोण?
सेवक म्हणाला, हा माझा धनी; तेव्हां तिनें बुरखा
घेऊन आपलें अंग झाकिलें. ६६ मग आपण काय काय
केलें तें सर्व त्या सेवकानें इसहाकास सांगितलें. ६७ मग
इसहाकानें तिला आपली आई सारा हिच्या डेऱ्यांत
आणिलें; त्यानें रिबकेचा अंगीकार केला व ती त्याची
पत्नी झाली, आणि तिच्यावर त्याचें प्रेम होतें; आणि
आपल्या आईच्या पश्चात् इसहाक सांत्वन पावला.

२५ १ अब्राहामानें दुसरी बायको केली, तिचें
नांव कटूरा. २ त्याला तिच्या पोटीं जिम्रान,
यक्षान, मदान, मिद्यान, इश्बाक व शुह हे पुत्र
झाले. ३ यक्षानास शबा व ददान हे झाले; आणि
ददानाचे पुत्र अश्शूरी, लटूशी व लऊमी हे होते.
४ मिद्यानाचे पुत्र एफा, एफर, हनोख, अबीदा व
एल्दा हे होते. हा सर्व कटूरेचा वंश. ५ अब्राहामानें
आपलें सर्वस्व इसहाकास दिलें. ६ आणि अब्राहामाच्या
उपपत्नी होत्या त्यांच्या पुत्रांस त्यानें देणग्या देऊन
आपल्या हयातींतच आपला पुत्र इसहाक याजपासून
वेगळें करून पूर्वेकडे पूर्व देशीं लावून दिलें. ७ अब्रा-
हामाच्या आयुष्याचीं वर्षें एकशेंपंचाहत्तर होतीं. ८ अब्रा-
हाम पुऱ्या वयाचा चांगला म्हातारा होऊन मरण
पावला व आपल्या पितरांस जाऊन मिळाला. ९ मग
त्याचे पुत्र इसहाक व इश्माएल यांनीं त्यास एफ्रोन बिन
सोहर हित्ती याच्या मम्रेसमोरील शेतांतल्या मकपेलाच्या
गुहेंत पुरिलें. १० हें शेत अब्राहामानें हेथींपासून विकत
घेतलें होतें, आणि तेथेंच अब्राहाम व त्याची बायको
सारा यांस पुरिलें. ११ अब्राहामाच्या मृत्यूनंतर देवानें
त्याचा पुत्र इसहाक याचें अभीष्ट केलें; इसहाक हा
त्या वेळीं लहाय-रोई विहिरीजवळ राहत असे.

१२ सारेची दासी मिसरीण हागार हिजपासून अब्रा-
हामाला इश्माएल नांवाचा पुत्र झाला, त्याची वंशावळ
ही: १३ इश्माएलाच्या पुत्रांचीं नांवें त्यांच्या वंशांप्रमाणें
हीं होत: नबायोथ हा इश्माएलाचा ज्येष्ठ पुत्र आणि
केदार, अदबील, मिबसाम, १४ मिश्मा, दुमा, मस्सा,
१५ हदद, तेमा, यतूर, नापीश व केदमा १६ हे
इश्माएलाचे पुत्र; त्यांच्या गांवांवरून व त्यांच्या गोटां-
वरून त्यांस पडलेलीं नांवें हीं; हे आपआपल्या वंशाचे
बारा सरदार होत. १७ इश्माएलाच्या आयुष्याचीं वर्षें
एकशेंसदतीस झाल्यावर तो मरण पावला व आपल्या
पितरांस जाऊन मिळाला. १८ त्याचे वंशज हवीलापासून
शूर देशापर्यंत वस्ती करून राहिले; हा देश मिसरासमोर
असून अश्शूराकडे जातांना लागतो; याप्रमाणें तो
आपल्या भाऊबंदांच्या देखत पूर्वेस जाऊन राहिला.

१९ अब्राहामाचा पुत्र इसहाक याची वंशावळ
ही : अब्राहामानें इसहाकास जन्म दिला. २० इसहाक
चाळीस वर्षांचा झाला तेव्हां त्यानें अरामी लाबान
याची बहीण पदन-अरामांतील अरामी बथुवेल याची
कन्या रिबका ही बायको केली. २१ इसहाकानें
आपल्या बायकोसाठीं परमेश्वराची विनवणी केली,
कारण ती वांझ होती; परमेश्वरानें त्याची विनवणी
ऐकली आणि त्याची स्त्री रिबका गर्भवती झाली.
२२ तिच्या उदरांत मुलें एकमेकांशीं झगडूं लागलीं
तेव्हां ती म्हणाली, असें चाललें तर मीं जगावें तरी
कशाला ? हें काय असेल तें परमेश्वराला विचारण्यास
ती गेली. २३ परमेश्वर तिला म्हणाला :—

तुझ्या गर्भाशयांत दोन राष्ट्रें आहेत,
तुझ्या उदरांतून दोन राष्ट्रें भिन्न होऊन निघतील;
एक राष्ट्र दुसऱ्याहून प्रबळ होईल;
आणि वडील धाकट्याचा अंकित होईल.

२४ तिचे दिवस भरून प्रसूतिसमय आला; तेव्हां
पाहा, तिच्या उदरांत जुळीं मुलें होतीं. २५ पहिलें
तांबूस वर्णाचें असून त्याचें सर्व अंग केशवस्त्रासारखें
होतें; त्याचें नांव एसाव असें ठेविलें. २६ त्यानंतर त्याचा
भाऊ बाहेर आला; त्याचा हात एसावाच्या टांचेला
होता म्हणून त्याचें नांव याकोब असें ठेविलें. तिनें
त्यांस जन्म दिला तेव्हां इसहाक साठ वर्षांचा होता.

२७ ते मुलगे वाढून मोठे झाले; एसाव हा
वनांत संचार करणारा हुशार पारधी झाला; व
याकोब हा साधा मनुष्य असून तंबूंत राहत असे.
२८ एसाव मृगमांस आणी तें इसहाक खाई म्हणून
तो त्याचा आवडता होता, आणि याकोब रिबकेचा
आवडता होता. २९ एकदा याकोब वरण शिजवीत
असतां एसाव रानांतून थकूनभागून आला. ३० तेव्हां
तो याकोबास म्हणाला, तें तांबडें दिसतेंना, त्यांतलें
कांहीं मला चटकन खाऊं घाल, मी अगदीं गळून
गेलों आहें; यावरून त्याचें नांव अदोम (तांबडा)
पडलें. ३१ याकोब त्यास म्हणाला, पहिल्यानें तुझा
ज्येष्ठत्वाचा हक्क मला मोबदला दे. ३२ एसाव म्हणाला,
हें पाहा, मी मरणोन्मुख झालों आहें; मला आपल्या
ज्येष्ठत्वाच्या हक्काचा काय उपयोग ? ३३ याकोब
म्हणाला, तर आतांच्या आतां मजशीं शपथ कर;
तेव्हां त्यानें शपथ करून आपल्या ज्येष्ठत्वाचा हक्क
याकोबास मोबदला दिला. ३४ तेव्हां याकोबानें
एसावाला भाकर व मसुरीचें वरण दिलें; तो खाऊन-
पिऊन उठला व चालता झाला; ह्याप्रमाणें एसावानें
आपलें ज्येष्ठत्व तुच्छ लेखिलें.

२६ १ पूर्वी अब्राहामाच्या वेळीं दुष्काळ पडला
होता तसा दुष्काळ आतां देशांत पडला, तेव्हां
इसहाक हा पलिष्ट्यांचा राजा अबीमलेख याज-
कडे गरार येथें गेला. २ तेव्हां परमेश्वरानें त्यास दर्शन
देऊन म्हटलें, खालीं मिसरांत जाऊं नको; मी सांगेन
त्या देशांत राहा. ३ त्या देशांत उपरी असा राहा; मी
तुजबरोबर असेन, तुझें अभीष्ट करीन; हे सर्व देश
मी तुला व तुझ्या संततीला देईन आणि मी तुझा बाप
अब्राहाम याशीं केलेली शपथ खरी करीन. ४ मी
आकाशांतील ताऱ्यांइतकी तुझी संतति वाढवीन, हे
सर्व देश तुझ्या संततीस देईन, आणि पृथ्वीवरील सर्व
राष्ट्रें तुझ्या संततीच्या द्वारें अभीष्ट पावतील; ५ कारण
अब्राहामानें माझा शब्द मानिला, माझें सांगणें ऐकलें,
माझ्या आज्ञा, माझे नियम व माझे कायदे पाळिले.
६ तेव्हां इसहाक गरारांत वस्ती करून राहिला.
७ तेथल्या लोकांनीं त्याच्या बायकोसंबंधानें त्याजकडे
चौकशी केली; तेव्हां तो म्हणाला, ही माझी बहीण,
कारण ही माझी बायको आहे असें म्हणण्याची त्याला
भीति वाटली; तो मनांत म्हणाला, रिबका देखणी
आहे; तेव्हां येथले लोक तिजसाठीं मला जिवें
मारावयाचे. ८ तो तेथें बराच काळ राहिल्यावर एके
दिवशीं पलिष्ट्यांचा राजा अबीमलेख यानें खिडकींतून
पाहिलें तों इसहाक आपली बायको रिबका हिंजशीं थट्टा-
मस्करी करितांना त्याच्या दृष्टीस पडला. ९ तेव्हां अबी-
मलेखानें त्याला बोलावून म्हटलें, खचीत ही तुझी स्त्री
आहे, तर ही माझी बहीण आहे असें तूं कसें सांगितलें ?
इसहाक त्यास म्हणाला, मीं विचार केला कीं तिच्यामुळें

माझ्या जिवास अपाय व्हावयाचा. १० अबीमलेख
म्हणाला, तूं आमच्याशीं असें कां केलें? बरें झालें,
नाहीं तर ह्या लोकांपैकीं कोणी तुझ्या बायकोपाशीं
सहज गेला असता आणि तूं आम्हांवर दोष आणिला
असतास. ११ मग अबीमलेखानें लोकांस ताकीद
दिली कीं जो कोणी या मनुष्यास किंवा याच्या बायकोस
हात लावील त्याला देहांत शासन होईल.

१२ इसहाकानें त्या देशांत धान्याची पेरणी केली आणि
त्याला त्याच वर्षी शंभरपट पीक मिळालें, आणि परमेश्वरानें
त्याचें कल्याण केलें; १३ तो थोर झाला आणि उत्तरो-
त्तर उत्कर्ष पावून मोठा संपन्न झाला. १४ तो कळप,
खिल्लारें व दासदासी यांचा धनी झाला; तेव्हां पलिष्टी
लोक त्याचा हेवा करूं लागले. १५ त्याचा बाप
अब्राहाम याच्या हयातींत त्याच्या चाकरांनीं ज्या
विहिरी खणिल्या होत्या त्या सर्व पलिष्ट्यांनीं मातीनें
भरून काढिल्या. १६ अबीमलेख इसहाकास म्हणाला, तूं
आमच्यांतून निघून जा, कारण तूं आमच्यांहून फारच
सामर्थ्यवान् झाला आहेस. १७ तेव्हां इसहाक तेथून
निघाला आणि गरार खोऱ्यांत डेरा देऊन तेथें राहिला.

१८ आणि त्याचा बाप अब्राहाम याच्या हयातींत
ज्या विहिरी खणिल्या होत्या व ज्या त्याच्या मृत्यू-
नंतर पलिष्ट्यांनीं बुजवून टाकिल्या होत्या, त्या त्यानें
पुनः उकरिल्या, आणि त्याच्या बापानें जीं नांवें दिलीं
होतीं तींच त्यानें त्यांस पुनः दिलीं. १९ इसहाकाचे
चाकर त्या खोऱ्यांत खणीत असतां तेथें त्यांस
जिवंत पाण्याचा झरा लागला. २० तेव्हां गरार येथले
गुराखी इसहाकाच्या गुराख्यांशीं कलह करून म्हणाले
कीं हें पाणी आमचें आहे; त्यावरून त्यानें त्या
विहिरीचें नांव एसेक (कलह) ठेविलें; कारण
त्यांनीं त्याजशीं कलह केला. २१ मग त्यांनीं दुसरी
विहीर खणिली, तिजवरूनहि त्यांनीं कलह केला
म्हणून त्यानें तिचें नांव सितना (वैर) ठेविलें.
२२ तो तेथून पुढें गेला, आणि तेथें त्यानें आणखी
एक विहीर खणिली; तेव्हां तिजवरून ते भांडले
नाहींत, म्हणून त्यानें तिचें नांव रहोबोथ (विस्तीर्ण)
असें ठेविलें, आणि तो म्हणाला, परमेश्वरानें आमच्या
भूमीचा विस्तार केला आहे, आतां ह्या देशांत
आमची वाढ होईल.

२३ तेथून पुढें तो वरतीं बैर-शेबा येथें गेला. २४
त्याच रात्रीं परमेश्वरानें त्यास दर्शन देऊन म्हटलें, तुझा
बाप अब्राहाम याचा देव मी आहें; भिऊं नको, कारण
मी तुजबरोबर आहें; मी आपला सेवक अब्राहाम याच्या-
प्रीत्यर्थ तुझें कल्याण करीन व तुझी संतति बहुगुणित
करीन. २५ यावर त्यानें तेथें एक वेदी बांधून परमे-
श्वराचें नाम घेऊन प्रार्थना केली; व तेथें आपला डेरा दिला;
तेथें इसहाकाच्या चाकरांनीं एक विहीर खणिली.

२६ त्यानंतर अबीमलेख आपला मित्र अहुज्जाथ व
आपला सेनापति पीकोल यांस बरोबर घेऊन गराराहून
त्याजकडे गेला. २७ तेव्हां इसहाक त्यांस म्हणाला, तुम्ही
तर माझा द्वेष करितां, आणि मला तुम्हीं आपल्यामधून
घालवून दिलें; असें असतां मजकडे आलां कां आलां?
२८ त्यांनीं म्हटलें, परमेश्वर तुझ्याबरोबर आहे हें
आम्हांस स्पष्ट दिसून आलें आहे; म्हणून आम्हीं
विचार केला कीं तुझ्याआमच्यामध्यें आणभाक व्हावी
आणि आम्हीं तुझ्याशीं करार करावा. २९ आम्हीं तुला
कांहीं उपद्रव केला नाहीं, आम्हीं केवळ तुझें बरें केलें
व तुला सुखानें रवाना केलें, म्हणून तूं आमचें कांहीं
वाईट करूं नये; आतां तुजवर परमेश्वराचा प्रसाद
झाला आहे. ३० तेव्हां त्यानें त्यांना मेजवानी दिली
आणि त्यांचें खाणेंपिणें झालें. ३१ त्यांनीं पहाटेस उठून
एकमेकांशीं आणभाक केली; मग इसहाकानें त्यांस
बोळविलें, आणि ते त्याजपासून सुखानें गेले. ३२ त्याच
दिवशीं असें झालें कीं त्याचे चाकर जी विहीर खणीत
होते तिजविषयीं त्यांनीं वर्तमान आणिलें कीं विहिरीस
पाणी लागलें. ३३ त्यानें तिचें नांव शेबा ठेविलें,
तिजवरून त्या नगराचें नांव बैर-शेबा पडलें.

३४ एसाव चाळीस वर्षांचा झाला तेव्हां त्यानें बैरी
हित्ती याची कन्या यहूदीथ आणि एलोन हित्ती याची
कन्या बासमथ ह्या बायका केल्या; ३५ त्या इसहाक व
रिबका यांच्या मनास टोचणीसारख्या झाल्या.

२७ १ इसहाक वृद्ध झाला व त्याची दृष्टि मंद
होऊन त्याला दिसेनासें झालें, तेव्हां त्यानें एके
दिवशीं आपला वडील पुत्र एसाव यास बोला-
वून म्हटलें, बाळा; तो म्हणाला, काय आज्ञा ? २ तो
त्यास म्हणाला, पाहा, मी आतां म्हातारा झालों
आहें, आणि मला मृत्यु केव्हां येईल नकळे. ३ तर
आपलीं शस्त्रें, आपलें धनुष्य व भाता हीं घेऊन वनांत
जा आणि पारध करून मजसाठीं मृगमांस आण,
४ आणि माझ्या आवडीचें असें रुचकर पक्वान्न तयार
करून आण; मी तें खाईन आणि मग मरण्यापूर्वी माझा
जीव तुला आशीर्वाद देईल.

५ इसहाक आपला पुत्र एसाव याशीं बोलत असतां
रिबका ऐकत होती. मग एसाव मृगाची पारध करण्यास
वनांत गेला. ६ इकडे रिबका आपला पुत्र याकोब यास
म्हणाली, पाहा, मीं तुझ्या बापास तुझा भाऊ एसाव याशीं
असें बोलतांना ऐकलें कीं ७ मृगाची पारध करून रुचकर
पक्वान्न तयार करून आण, म्हणजे मी तें खाऊन मरण्या-
पूर्वी परमेश्वरासमक्ष तुला आशीर्वाद देईन. ८ तर माझ्या
बाळा, आतां मी सांगतें तें ऐक : माझ्या सांगण्याप्रमाणें
कर. ९ आतांच्या आतां कळपांत जाऊन त्यांतलीं
दोन चांगलीं करडें घेऊन ये; म्हणजे मी त्यांचें
तुझ्या बापाच्या आवडीचें पक्वान्न तयार करीन;
१० मग तें तुझ्या बापाकडे घेऊन जा, म्हणजे तो तें
खाऊन तुला मरण्यापूर्वी आशीर्वाद देईल. ११ यावर
याकोब आपली आई रिबका हिला म्हणाला,
पाहा, माझा भाऊ एसाव केसाळ माणूस आहे, आणि
मी तर केसरहित माणूस आहें. १२ माझा बाप मला
कदाचित् चाचपून पाहील आणि मी त्याला ठकवीत
आहें असें त्याला दिसून येईल, मग आशीर्वादाऐवजीं शाप
मात्र मी मिळवीन. १३ त्याची आई त्याला म्हणाली,
माझ्या बाळा, तुला शाप मिळाल्यास तो मला लागो;
माझें एवढें म्हणणें ऐक व करडें घेऊन ये; १४ तेव्हां
त्यानें जाऊन तीं आईकडे आणिलीं, आणि तिनें त्याच्या
बापाच्या आवडीचें पक्वान्न तयार केलें. १५ मग
रिबकेनें आपला वडील पुत्र एसाव याचीं घरांत
असलेलीं आपल्याजवळचीं उंची वस्त्रें घेऊन आपला
धाकटा पुत्र याकोब याला लेववलीं; १६ तिनें त्याच्या
हातांस व मानेच्या गुळगुळीत भागांस करडांचीं कातडीं
लपेटिलीं, १७ आणि आपण तयार केलेलें रुचकर
पक्वान्न व भाकर हीं आपला पुत्र याकोब याच्या हातीं दिलीं.

१८ तो आपल्या बापाकडे जाऊन म्हणाला,
बाबा; तेव्हां तो म्हणाला, काय आहे ? माझ्या
बाळा, तूं कोण ? १९ तेव्हां याकोब आपल्या बापास
म्हणाला, मी एसाव, आपला वडील पुत्र आहें; आपल्या
सांगण्याप्रमाणें मीं केलें आहे; तर उठून बसा
आणि मीं मृगमांस आणिलें आहे एवढें खा;
आणि आपला जीव मला आशीर्वाद देवो. २० तेव्हां
इसहाक आपल्या पुत्रास म्हणाला, माझ्या बाळा, तुला
तें इतक्या लौकर कसें मिळालें ? तो म्हणाला, आपला
देव परमेश्वर मला अनुकूल झाला. २१ मग इसहाक
याकोबास म्हणाला, माझ्या बाळा, अमळ जवळ ये; तूं
माझा पुत्र एसावच आहेस कीं काय हें मला चाचपून
पाहूं दे. २२ हें ऐकून याकोब आपला बाप इसहाक
याच्याजवळ गेला; तो त्यास चाचपून म्हणाला, वाणी
तर याकोबाची पण हात एसावाचे आहेत. २३ त्याचे हात
त्याचा भाऊ एसाव याच्या हातांसारखे केसाळ होते
म्हणून त्यानें त्याला ओळखिलें नाहीं आणि त्याला
आशीर्वाद दिला. २४ तो त्यास म्हणाला, तूं माझा
पुत्र एसावच आहेस काय ? तो म्हणाला, होय, मीच
तो. २५ तो म्हणाला, तें मजकडे आण, मग माझ्या पुत्रानें
म्हणजे तूं आणिलेलें मृगमांस खाऊन माझा जीव
तुला आशीर्वाद देईल. याकोबानें तें त्याजकडे
आणिलें, व त्यानें तें खाल्लें; मग त्यानें त्यास द्राक्षारस
आणून दिला तो तो प्याला. २६ मग त्याचा बाप
इसहाक त्यास म्हणाला, माझ्या मुला, अमळ जवळ
येऊन माझें चुंबन घे. २७ त्यानें जवळ जाऊन त्याचें
चुंबन घेतलें; तेव्हां त्यानें त्याच्या वस्त्रांचा वास घेऊन
आशीर्वाद दिला तो असा :—

पाहा, परमेश्वरानें आशीर्वाद दिलेल्या
शेताप्रमाणें

माझ्या पुत्राचा सुगंध येत आहे;
२८ देव तुला आकाशान्तें दहिंवर,
पृथ्वीवरील सुपीक जमिनी आणि विपुल धान्य व
द्राक्षारस देवो;
२९ लोक तुझी सेवा करोत;
राष्ट्रें तुला नमोत;
तूं आपल्या भाऊबंदांचा स्वामी हो;
तुझे सहोदर तुला नमोत;
तुला शापणारे सगळे शापग्रस्त होवोत;
तुला आशीर्वाद देणारे सगळे आशीर्वाद पावोत.
३० इसहाकानें याकोबास आशीर्वाद देण्याचें पुरें
केलें; आणि याकोब आपला बाप इसहाक याच्याजवळून
जातो न जातो तोंच त्याचा भाऊ एसाव शिकारीहून
आला. ३१ त्यानेंहि रुचकर पक्वान्न तयार करून
आपल्या बापाकडे आणिलें व त्यास म्हटलें, माझ्या
बाबांनीं उठून आपल्या पुत्रानें आणिलेलें मृगमांस
खावें, आणि आपल्या जिवानें मला आशीर्वाद द्यावा.
३२ हें ऐकून त्याचा बाप इसहाक त्यास म्हणाला, तूं
कोण ? त्यानें म्हटलें, मी आपला पुत्र, आपला ज्येष्ठ पुत्र
एसाव. ३३ तेव्हां इसहाक अतिशयित कंपायमान
होऊन म्हणाला, तर मृगमांस घेऊन मजकडे जो
आला, आणि तूं येण्यापूर्वी मीं तें खाऊन ज्यास आशी-
र्वाद दिला तो कोण ? तो आशीर्वादित होणारच.
३४ एसावानें आपल्या बापाचे हे शब्द ऐकले तेव्हां
तो अति दुःखानें हंबरडा फोडून आपल्या बापास
म्हणाला, बाबा, मलाहि आशीर्वाद द्या. ३५ तो
म्हणाला, तुझा भाऊ कपटानें येऊन तुला मिळावयाचा
आशीर्वाद घेऊन गेला. ३६ तेव्हां तो म्हणाला, त्याला
याकोब हें नांव यथार्थच ठेविलें नाहीं काय ? कारण
त्यानें यासकट दोनदा मला दगा केला; त्यानें माझा
ज्येष्ठत्वाचा हक्क घेतला तो घेतला व आतां माझ्या
आशीर्वादाचाहि त्यानें अपहार केला; तर आपण मजसाठींहि
कांहीं आशीर्वाद राखून ठेविला नाहीं काय ? ३७ तेव्हां
इसहाकानें उत्तर दिलें, पाहा, मीं त्याला तुझा स्वामी
करून ठेविलें आहे, त्याचे सर्व भाऊबंद त्याचे अंकित
केले आहेत आणि धान्य व द्राक्षारस ह्यांच्यायोगें त्याला
मीं परिपुष्ट केलें आहे; तर माझ्या पुत्रा, आतां तुजसाठीं
मी काय करूं ? ३८ एसाव बापास म्हणाला, बाबा,
आपणापाशीं एकच आशीर्वाद आहे काय ? बाबा, मलाहि
आशीर्वाद द्या. असें बोलून एसाव हेल काढून रडला.
३९ तेव्हां त्याचा बाप इसहाक त्यास म्हणाला,
पाहा, पृथ्वीवरील सुपीक जमिनींवर,
वरून आकाशांतील दंव पडतें तेथें तुझी
वस्ती होईल;
४० तूं आपल्या तरवारीनें आपलें उपजीवन करिशील
व आपल्या भावाचें दास्य करिशील;
तरी असें घडून येईल कीं तूं अनावर होशील,
तेव्हां तूं आपल्या खांद्यावरचें त्याचें जूं उडवून
देशील.
४१ याकोबास आपल्या बापानें आशीर्वाद दिला
त्यामुळें एसावानें त्याच्याशीं वैर धरिलें; एसावानें
आपल्या मनाशीं म्हटलें, माझ्या बापाचें सुतक
धरण्याचे दिवस जवळ आले आहेत; त्यानंतर मी
आपला भाऊ याकोब यास जिवें मारीन. ४२ आपला
वडील पुत्र एसाव याचें हें म्हणणें रिबकेला कोणीं
कळविलें तेव्हां तिनें आपला धाकटा पुत्र याकोब
यास बोलावून म्हटलें, पाहा, तुला जिवें मारण्याचा
बेत करून तुझा भाऊ एसाव आपल्या जिवाचें समा-
धान करून घेत आहे. ४३ तर माझ्या बाळा, आतां
माझें ऐक: ऊठ, हारान येथें माझा भाऊ लाबान आहे
त्याजकडे पळून जा; ४४ आणि तुझ्या भावाचा तुज-
वरचा राग जाईपर्यंत थोडे दिवस त्याजपाशीं राहा;
४५ तुजवरचा तुझ्या भावाचा राग जाऊन तूं त्याला
जें केलें त्याचा त्याला विसर पडेपर्यंत तेथें राहा;
मग मी तुला तेथून बोलावणें पाठवून आणीन; एकाच
दिवशीं तुम्ही दोघे मला कां अंतरावे ?
४६ तेव्हां रिबका इसहाकास म्हणाली, या हेथींच्या
कन्यांमुळें माझा जीव मला नकोसा झाला आहे;
यांच्यासारखी, हेथींच्या कन्यांतली, या देशाच्या
कन्यांतली एखादी याकोबानें वरिली तर मला जगून

काय लाभ? १ तेव्हां इसहाकानें याकोबास
२८ बोलावून आशीर्वाद दिला आणि बजावून
सांगितलें कीं कनानी कन्यांपैकीं कोणी
नवरी करूं नको. २ तर ऊठ, पदन-अराम येथें तुझ्या
आईचा बाप बथुवेल याच्या घरीं जा आणि तुझा मामा
लाबान याच्या कन्यांपैकीं नवरी कर. ३ सर्वसमर्थ
देव तुला आशीर्वाद देवो, तुला फलद्रूप करून तुझी
वंशवृद्धि अशी करो कीं तुजपासून राष्ट्रसमुदाय उद्भवो;
४ तो तुला व तुजबरोबर तुझ्या संततीला अब्राहामास
दिलेला आशीर्वाद देवो, म्हणजे देवानें अब्राहामास
दिलेला देश, ज्यांत तूं हल्लीं मुशाफर आहेस, तो तुझें
वतन होईल. ५ अशी इसहाकानें याकोबाची रवानगी
केली, आणि याकोब पदन-अराम येथें याकोब व एसाव
यांची आई रिबका हिचा भाऊ लाबान, जो अरामी
बथुवेलाचा पुत्र, त्याजकडे गेला.

६ एसावानें पाहिलें कीं इसहाकानें याकोबास आशी-
र्वाद देऊन पदन-अराम येथील नवरी करण्यासाठीं तिकडे
पाठविलें आहे; आणि आशीर्वाद देतेवेळीं त्यानें त्यास
बजाविलें आहे कीं कनानी कन्यांपैकीं नवरी करूं नको;
७ आणि याकोब आपल्या आईबापांची आज्ञा मानून
पदन-अरामास गेला आहे. ८ कनानी कन्या आपला
बाप इसहाक यास पसंत नाहींत हें जाणून ९ एसाव
इश्माएलाकडे गेला आणि त्यानें इश्माएल बिन अब्राहाम
याची कन्या व नबायोथाची बहीण महलथ हिच्याशीं
विवाह करून तिला आपल्या बायकांत सामील केलें.

१० इकडे याकोब बैर-शेबाहून हारानास जावयास
निघाला. ११ तो एके जागीं पोहंचला असतां सूर्य माव-
ळला म्हणून तेथें रात्र घालवावी या विचारानें तेथला
एक धोंडा उशास घेऊन तो त्या ठिकाणीं निजला.
१२ तेव्हां त्यास स्वप्न पडलें त्यांत त्यानें असें पाहिलें
कीं एक शिडी पृथ्वीवर उभी केली असून तिचा शेंडा
आकाशास लागला आहे; आणि तीवरून देवदूत चढत-
उतरत आहेत. १३ आणि पाहा, परमेश्वर त्याच्या-
पाशीं उभा राहून त्यास म्हणाला, मी परमेश्वर तुझा
पिता अब्राहाम याचा देव व इसहाकाचा देव आहें;
ज्या भूमीवर तूं निजला आहेस ती मी तुला व तुझ्या
संततीला देईन; १४ तुझी संतति संख्येनें पृथ्वीच्या
रजांइतकी होईल, पूर्व व पश्चिम, उत्तर व दक्षिण
अशा चारी दिशांस तुझा विस्तार होईल आणि तुझ्या
व तुझ्या संततीच्या द्वारें पृथ्वीवरील अवघीं कुळें
अभीष्ट पावतील. १५ पाहा, मी तुजबरोबर आहें;
आणि जिकडेजिकडे तूं जाशील त्या सर्व ठिकाणीं
मी तुझें संरक्षण करीन आणि तुला या देशांत परत
आणीन; तुला सांगितलें तें करीपर्यंत मी तुला अंतर
देणार नाहीं. १६ मग याकोब झोपेंतून जागा होऊन
म्हणाला, खरोखर या ठिकाणीं परमेश्वराचें वास्तव्य
आहे, पण हें मला कळलें नव्हतें. १७ तो भयभीत
होऊन म्हणाला, हें किती भयप्रद स्थल आहे! हें
प्रत्यक्ष देवाचें भुवन, स्वर्गाचें द्वार आहे!

१८ याकोब पहाटेस उठला आणि जो धोंडा त्यानें
उशास घेतला होता त्याचा त्यानें स्मारकस्तंभ उभारून त्यास
तेलाचा अभ्यंग केला. १९ आणि त्या स्थलाचें नांव
बेथेल (देवाचें घर) असें ठेविलें. तेथल्या नगराचें पहिलें
नांव लूज असें होतें. २० याकोबानें असा नवस केला
कीं देव मजबरोबर राहून ज्या वाटेनें मी जात आहें तींत
माझें संरक्षण करील आणि मला खावयास अन्न व
ल्यावयास वस्त्र देईल, २१ आणि मी आपल्या पितृगृहीं
सुखरूप परत येईन, तर परमेश्वर माझा देव खरा;
२२ आणि हा जो धोंडा मीं स्मारकस्तंभ म्हणून उभा
केला आहे त्याचें देवमंदिर होईल; आणि जें अवघें
तूं मला देशील त्याचा दशमांश मी तुला अवश्य देईन.

१ मग याकोब मार्गस्थ होऊन पूर्वेकडील
२९ लोकांच्या मुलखांत जाऊन पोहंचला. २ तेथें त्यानें
पाहिलें तों एका शेतांत एक विहीर त्याच्या
दृष्टीस पडली; तिच्या आसपास मेंढरांचे तीन कळप
बसलेले होते; कारण त्या विहिरीचें पाणी काढून
कळपांस पाजीत असत; त्या विहिरीच्या तोंडावर धोंडा
होता तो मोठा होता. ३ सर्व कळप तेथें जमल्यावर
विहिरीच्या तोंडावरचा धोंडा लोटून मेंढरांस पाणी
पाजीत आणि मग तो परत जागच्याजागीं विहिरीच्या

तोंडावर ठेवीत. ४ याकोब त्यांस म्हणाला, माझ्या
बांधवांनो, तुम्ही कोठले? ते म्हणाले, आम्ही हारानां-
तले. ५ मग त्यानें त्यांस विचारिलें, नाहोराचा पुत्र
लाबान याला तुम्ही ओळखतां काय? ते म्हणाले,
ओळखितों. ६ तेव्हां त्यानें म्हटलें, तो बरा आहे
काय? ते म्हणाले, बरा आहे, आणि ती पाहा, त्याची
कन्या राहेल मेंढरें घेऊन इकडेच येत आहे. ७ तो
म्हणाला, पाहा, अजून दिवस बराच आहे, जनावरें
एकवट करण्याची वेळ झाली नाहीं, तर मेंढरांस पाणी
पाजा आणि चारावयास घेऊन जा. ८ ते म्हणाले, तसें
करितां येत नाहीं; सर्व कळप एकवट झाल्यावर
विहिरीच्या तोंडचा धोंडा लोटितात आणि मग
आम्ही मेंढरांस पाणी पाजीत असतों. ९ तो त्यांच्याशीं
बोलत आहे इतक्यांत राहेल बापाचीं मेंढरें घेऊन
आली; तीच त्यांस चारीत असे. १० याकोबानें
आपला मामा लाबान याची कन्या राहेल आणि
आपला मामा लाबान याचीं मेंढरें पाहिलीं तेव्हां
त्यानें जवळ जाऊन विहिरीच्या तोंडावरचा धोंडा
लोटून आपला मामा लाबान याच्या मेंढरांस पाणी
पाजिलें. ११ मग याकोब राहेलीचें चुंबन घेऊन
मोठ्यानें रडला. १२ याकोबानें राहेलीस सांगितलें,
मी तुझ्या बापाचा आप्त, रिबकेचा पुत्र, आहें; तेव्हां
तिनें धावत जाऊन आपल्या बापास हें कळविलें.

१३ लाबानानें आपला भाचा याकोब आल्याचें
वर्तमान ऐकलें तेव्हां तो धावून त्यास सामोरा
गेला आणि त्यास आलिंगन देऊन त्याचें त्यानें
चुंबन घेतलें; आणि त्यानें त्याला आपल्या घरीं नेलें.
मग त्यानें लाबानास सर्व वृत्तांत कथन केला.
१४ तेव्हां लाबान त्यास म्हणाला, होय, तूं खरोखर
माझ्या हाडामांसाचा आहेस. याकोब त्याजपाशीं एक
महिना राहिला. १५ त्यानंतर लाबान त्यास म्हणाला,
तूं माझा आप्त म्हणून माझी चाकरी फुकट करावी
कीं काय? तुझें वेतन काय तें मला सांग. १६ लाबानास
दोन कन्या होत्या; वडील कन्येचें नांव लेआ व
धाकटीचें नांव राहेल. १७ लेआ डोळ्यांनीं अधू
होती, पण राहेल बांध्यानें सुरेख व दिसावयाला सुंदर
होती. १८ याकोबाची राहेलीवर प्रीति बसली होती
म्हणून तो म्हणाला, आपली धाकटी कन्या राहेल
हिजसाठीं मी सात वर्षें आपली चाकरी करीन. १९ यावर
लाबान म्हणाला, ती दुसऱ्याला द्यावी त्यापेक्षां
तुला द्यावी हें बरें; तूं मजपाशीं राहा. २० तेव्हां
याकोबानें राहेलीसाठीं सात वर्षें चाकरी केली;
तिजवर त्याची प्रीति असल्यामुळें तीं वर्षें त्याला केवळ
थोड्या दिवसांसारखीं भासलीं.

२१ नंतर याकोब लाबानास म्हणाला, आतां माझी
मुदत भरली आहे, माझी बायको मला द्या म्हणजे मी
तिजपाशीं जाईन. २२ मग लाबानानें तेथल्या सर्व लोकांस
बोलावून मेजवानी दिली. २३ संध्याकाळीं असें झालें कीं
त्यानें आपली कन्या लेआ हिला हातीं धरून त्याजकडे
आणिलें, तेव्हां तो तिजपाशीं गेला. २४ आणि
लाबानानें आपली दासी जिल्पा ही आपली कन्या लेआ
हिची दासी व्हावी म्हणून तिला दिली. २५ सकाळ
झाली तेव्हां पाहतो तों ती लेआ; मग तो लाबानास
म्हणाला, आपण मजशीं हें काय केलें? मी राहेलीसाठीं
आपली चाकरी केली ना? मला कां फसविलें? २६ त्यास
लाबान म्हणाला, वडील मुलीच्यापूर्वी धाकटीला
द्यावें अशी आमच्याकडे चाल नाहीं. २७ हिचें
सप्तक पुरें होऊं दे, म्हणजे आणखी सात वर्षें तूं माझी
चाकरी केल्याबद्दल आम्ही तीहि तुला देऊं.
२८ याकोबानें तसें केलें; आणि तिचें सप्तक पुरें केल्या-
वर त्यानें त्याला आपली कन्या राहेल बायको करून
दिली. २९ लाबानानें आपली दासी बिल्हा ही आपली
कन्या राहेल हिची दासी व्हावी म्हणून तिला दिली.
३० तो राहेलीपाशींहि गेला; लेआपेक्षां राहेलीवर
त्याची प्रीति अधिक होती म्हणून त्यानें आणखी सात
वर्षें त्याजपाशीं राहून त्याची चाकरी केली.

३१ परमेश्वरानें पाहिलें कीं लेआ नावडती आहे;
म्हणून त्यानें तिची कूस वाहती केली आणि राहेल
वांझ राहिली. ३२ लेआ गर्भवती होऊन तिला पुत्र
झाला, त्याचें नांव तिनें रऊबेन ठेविलें; ती म्हणाली,

परमेश्वरानें माझ्या दुःखाकडे पाहिलें आहे, कारण
आतां माझा नवरा मजवर प्रीति करील. ३३ ती पुनः
गर्भवती होऊन तिला पुत्र झाला, तेव्हां ती म्हणाली,
मी नावडती आहें हें देवानें ऐकलें म्हणून त्यानें मला
हाहि दिला; यास्तव तिनें त्याचें नांव शिमोन ठेविलें.
३४ ती पुनः गर्भवती होऊन तिला पुत्र झाला; तेव्हां
ती म्हणाली, मला आतां तीन पुत्र झाले, आतां बरीक
माझा नवरा मजशीं मिळून राहील; म्हणून तिनें त्याचें
नांव लेवी ठेविलें. ३५ ती पुनः गर्भवती होऊन तिला
पुत्र झाला तेव्हां ती म्हणाली, आतां मी परमेश्वराचें
स्तवन करीन; यावरून तिनें त्याचें नांव यहूदा ठेविलें;
पुढें तिचें जनन थांबलें.

**३०** १ याकोबास आपल्यापासून कांहीं मूलबाळ
होत नाहीं असें पाहून राहेल आपल्या बहिणीचा
मत्सर करूं लागली आणि याकोबास म्हणाली,
आपण मला अपत्यवती करा, नाहीं तर माझा प्राण
चालला. २ तेव्हां याकोब राहेलीवर रागावून म्हणाला,
मी काय देवाच्या ठिकाणीं आहे? त्यानेंच तुझ्या पोटीं
फळ निपजूं दिलें नाहीं. ३ मग ती म्हणाली, पाहा, ही
माझी दासी बिल्हा आहे, हिजपाशीं जा म्हणजे ही माझ्या
मांडीवर प्रसूत होऊन हिच्या योगें मला मुलें प्राप्त होतील.
४ तेव्हां तिनें आपली दासी बिल्हा त्याला बायको
करून दिली आणि याकोब तिजपाशीं गेला. ५ बिल्हा
याकोबापासून गर्भवती होऊन तिला पुत्र झाला. ६ मग
राहेल म्हणाली, देवानें माझा न्याय केला आहे आणि
माझें गार्‍हाणें ऐकून मला पुत्र दिला आहे; म्हणून तिनें
त्याचें नांव दान ठेविलें. ७ मग राहेलीची दासी बिल्हा
याकोबापासून पुनः गर्भवती होऊन तिला दुसरा पुत्र
झाला. ८ तेव्हां राहेल म्हणाली, मीं आपल्या बहिणीशीं
प्रचंड झोंबी करून यश मिळविलें आहे; यास्तव
तिनें त्याचें नांव नफताली ठेविलें.

९ आपलें जनन थांबलें असें लेआ हिनें पाहून आपली
दासी जिल्पा याकोबाला बायको करून दिली. १० याकोबा-
पासून लेआ हिची दासी जिल्पा हिला पुत्र झाला; ११
तेव्हां लेआ म्हणाली, मी केवढी भाग्याची! आणि तिनें
त्याचें नांव गाद ठेविलें. १२ लेआ हिची दासी जिल्पा
हिला याकोबापासून दुसरा पुत्र झाला. १३ तेव्हां लेआ
म्हणाली, मी मोठी धन्य आहें! इतर स्त्रिया मला धन्य
म्हणतील; म्हणून तिनें त्याचें नांव आशेर ठेविलें.

१४ गव्हांच्या हंगामांत रऊबेन शेतांत गेला असतां
त्यास पुत्रदात्रीचीं फळें मिळालीं, तीं त्यानें आपली आई
लेआ हिला नेऊन दिलीं; तेव्हां राहेल लेआ हिला
म्हणाली, पुत्रदात्रीचीं फळें तुझ्या पुत्रानें आणिलीं आहेत
त्यांतलीं कांहीं मला दे. १५ तेव्हां ती तिला म्हणाली,
माझा नवरा तूं घेतला हें काय थोडें झालें म्हणून तूं
माझ्या पुत्रानें आणलेलीं फळेंहि घेऊं पाहतेस? राहेल
म्हणाली, तुझ्या पुत्रानें आणिलेल्या पुत्रदात्रीच्या
फळांच्या मोबदला नवरा आज रात्रीं तुजपाशीं निजेल.
१६ संध्याकाळीं याकोब शेतांतून घरीं आला तेव्हां
लेआ त्यास सामोरी जाऊन म्हणाली, आपण मजपाशीं
या; माझ्या मुलानें आणिलेलीं पुत्रदात्रीचीं फळें देऊन
मीं आपणाला खरोखर भाड्यानें घेतलें आहे. तेव्हां
त्या रात्रीं तो तिजपाशीं निजला. १७ देवानें लेआ
हिचें गार्‍हाणें ऐकलें, आणि ती गर्भवती होऊन
याकोबापासून तिला पांचवा पुत्र झाला. १८ तेव्हां
लेआ म्हणाली, मीं आपली दासी माझ्या नवर्‍यास
दिली म्हणून देवानें मला हा मोबदला दिला आहे; आणि
तिनें त्याचें नांव इस्साखार ठेविलें. १९ याकोबापासून
लेआ पुनः गर्भवती होऊन तिला सहावा पुत्र झाला.
२० तेव्हां लेआ म्हणाली, देवानें मला चांगलें आंदण
दिलें आहे; या खेपेस माझा नवरा माझ्याशीं मिळून
राहील, कारण त्याला माझ्या पोटीं सहा पुत्र झाले आहेत,
म्हणून तिनें त्याचें नांव जबुलून ठेविलें. २१ त्यानंतर
तिला एक कन्या झाली तिचें नांव तिनें दीना ठेविलें.

२२ मग देवानें राहेलीची आठवण केली; आणि
त्यानें तिचें गार्‍हाणें ऐकून तिची कूस वाहती केली.
२३ ती गर्भवती होऊन तिला पुत्र झाला; ती म्हणाली,
देवानें माझी अप्रतिष्ठा दूर केली आहे. २४ म्हणून
तिनें त्याचें नांव योसेफ ठेवून म्हटलें, परमेश्वर मला
पुत्राची आणखी जोड देवो.

२५ राहेलीस योसेफ झाला तेव्हां याकोब लाबानास
म्हणाला, माझी रवानगी करा म्हणजे मी स्वदेशीं
आपल्या ठिकाणीं जाईन. २६ मी ज्यांच्यासाठीं
आपली चाकरी केली त्या माझ्या स्त्रिया व मुलें मला
द्या म्हणजे मी जातों; आपली चाकरी मीं कशी काय
केली ती आपणाला ठाऊक आहेच. २७ तेव्हां लाबान
त्यास म्हणाला, तुझी मजवर कृपादृष्टि असल्यास राहा-
वयाचें कर; तुझ्यामुळें परमेश्वरानें माझें अभीष्ट केलें
आहे हें मला शकुन पाहून कळलें आहे. २८ तो
आणखी म्हणाला, तुझा मुशाहिरा काय तो मला सांग,
तो मी तुला देईन. २९ तो त्यास म्हणाला, मीं आपली
सेवा कशी केली आणि आपलीं गुरेंढोरें माझ्या निगे-
खालीं कशीं होतीं हें आपणाला विदितच आहे. ३० मी
येण्यापूर्वी आपणापाशीं थोडें होतें, तें आतां बहुतपट
वाढलें आहे; जेथें माझा पाय लागला तेथें परमेश्वरानें
आपलें कल्याण केलें आहे; तर आतां मी स्वतःच्या घरा-
दाराचें केव्हां पाहूं? ३१ लाबान म्हणाला, मी तुला काय
देऊं? याकोब म्हणाला, मला कांहीं देऊं नका; माझी
केवळ एकच गोष्ट कबूल कराल तर मी पूर्ववत् आपलें
कळप चारीत व संभाळीत राहीन. ३२ आज मी
आपल्या सर्व कळपांत फिरून त्यांतील मेंढरांपैकीं ठिपके-
दार, कबऱ्या आणि काळ्या रंगाचीं मेंढरें, तसेंच
बकऱ्यांपैकीं ठिपकेदार व कबऱ्या रंगाचीं बकरीं वेगळीं
काढीन; हाच माझा मुशाहिरा. ३३ उद्यां आपण
माझ्या मुशाहिऱ्याचा हिशोब पाहण्यास आलां तर
माझ्या प्रामाणिकपणाची आपणालाहि साक्ष पटेल; म्हणजे
बकऱ्यांपैकीं जीं ठिपकेदार व कबरीं नाहींत व
मेंढरांपैकीं जीं काळीं नाहींत अशीं कांहीं मजपाशीं
निघालीं तर तीं चोरीचीं समजा. ३४ तेव्हां लाबान
म्हणाला, ठीक, तुझ्या म्हणण्याप्रमाणें का होईना.
३५ तेव्हां त्याच दिवशीं बांडे व ठिपकेदार एडके,
थोडाबहुत पांढरा रंग असलेल्या सर्व ठिपकेदार व
कबऱ्या शेळ्या, आणि मेंढरांपैकीं सगळीं काळीं मेंढरें
हीं वेगळीं करून लाबानानें आपल्या पुत्रांच्या हवालीं
केलीं. ३६ त्यानें आपणामध्यें व याकोबामध्यें तीन
मजलांचें अंतर ठेविलें; आणि याकोब लाबानाचे बाकी
उरलेले कळप चारीत राहिला. ३७ मग याकोबानें हिवर,
बदाम आणि अर्मोन ह्या झाडांच्या हिरव्या व कोंवळ्या
छड्या काढिल्या व त्या सोलून पांढऱ्या पट्ट्या काढिल्या
आणि त्यांच्या अंतरसालीचें पांढरें अंग उघडें केलें.
३८ त्या सोललेल्या छड्या त्यानें त्या शेळ्यांमेंढ्यांसमोर
त्यांच्या पाणी पिण्याच्या पन्हळांत व कुंड्यांत ठेविल्या;
त्या पाणी पिण्यास येत तेव्हां फळत. ३९ त्या छड्यां-
समोर शेळ्यामेंढ्या फळत आणि त्यांस बांडीं, ठिपके-
दार आणि कबरीं अशीं पोरें होत. ४० मग याकोबानें
कोकरें वेगळीं केलीं आणि लाबानाच्या कळपांत अस-
लेल्या बांड्या व काळ्या मेंढ्यांकडे कळपांचीं तोंडें केलीं;
त्यानें आपले कळप वेगळे केले, लाबानाच्या कळपांत
ठेविले नाहींत. ४१ धष्टपुष्ट मेंढ्या फळत तेव्हां त्यांच्या
दृष्टीसमोर पन्हळांत त्या तो छड्या ठेवी, यासाठीं कीं
त्यांनीं त्या छड्यांच्या दरम्यान फळावें. ४२ मेंढ्या
निर्बळ असल्या म्हणजे त्या छड्या त्यांच्यापुढें तो
ठेवीत नसे; या प्रकारें दुबळ्या त्या लाबानाच्या व
धष्टपुष्ट त्या याकोबाच्या झाल्या. ४३ अशा रीतीनें तो
मनुष्य फार संपन्न झाला आणि बहुत मेंढरें, दास,
दासी, उंट व गाढव हीं त्यानें संपादन केलीं.

## ३१

१ नंतर याकोबाच्या कानावर लाबानाच्या
पुत्रांचें असें म्हणणें आलें कीं आमच्या बापाचें
होतें नव्हतें तें सर्व याकोबानें लुबाडिलें आहे,
आणि आमच्या बापाच्या वित्तांतून त्यानें ही सर्व
दौलत मिळविली आहे. २ लाबानाची चर्या पूर्वी-
प्रमाणें आपणावर प्रसन्न नाहीं असें याकोबानें ताडिलें.
३ परमेश्वरानें याकोबास सांगितलें कीं तूं आपल्या
वडिलांच्या देशीं, आपल्या गोतांत परत जा, मी
तुजबरोबर असेन. ४ तेव्हां याकोबानें राहेल व
लेआ यांस निरोप पाठवून शेतांत आपल्या कळपाकडे
बोलाविलें. ५ त्या आल्यावर तो त्यांस म्हणाला;
तुमच्या बापाच्या चर्येवरून मीं ताडिलें कीं ती पूर्वी-
प्रमाणें मजवर प्रसन्न नाहीं, तथापि माझ्या वाड-
वडिलांचा देव मजबरोबर आहे. ६ मीं सर्व बळ

खर्चून तुमच्या बापाची चाकरी केली हें तुम्हांस ठाऊक
आहे; ७ तरी तुमच्या बापानें मला फसवून दहादां
माझ्या मुशाहिऱ्यांत फेरबदल केला; पण देवानें
त्याला माझी कांहीं हानि करूं दिली नाहीं. ८ त्यानें
जेव्हां म्हटलें कीं ठिपकेदार शेळ्या तुला मुशाहिऱ्या-
दाखल मिळतील तेव्हां सर्व कळपांस ठिपकेदार पोरें
होऊं लागलीं; त्यानें जेव्हां म्हटलें कीं बांड्या बकऱ्या
तुझ्या, तेव्हां सर्व कळपांस बांडीं पोरें होऊं लागलीं.
९ या प्रकारें देवानें तुमच्या बापाचीं जनावरें हिरावून
मला दिलीं आहेत. १० कळप फळावयाच्या ऋतूंत मीं
आपली दृष्टि वर करून स्वप्नांत पाहिलें तों मेंढ्यांवर
उडणारे एडके बांडे, ठिपकेदार व करडे होते.
११ तेव्हां स्वप्नांत देवदूतानें मला हाक मारिली,
याकोबा; मी म्हणालों, काय आज्ञा आहे? १२ तो
म्हणाला, आपली दृष्टि वर करून पाहा; मेंढ्यांवर
उडणारे सर्व एडके बांडे, ठिपकेदार व करडे आहेत;
लाबान तुजशीं कसा वर्तत आहे तें मीं पाहिलें आहे.
१३ बेथेल येथें तूं एका स्तंभास अभ्यंग करून मला
नवस केला तेथला मी देव आहें; आतां या देशांतून
निघून तूं आपल्या जन्मभूमीस परत जा. १४ तेव्हां
राहेल व लेआ त्यास म्हणाल्या, आतां आमच्या बापाच्या
घरीं आणखी कांहीं वेगळा वांटा किंवा वतन आम्हांसाठीं
थोडेंच ठेविलें आहे? १५ त्याच्या दृष्टीनें आम्ही परक्याच
कीं नाहीं? त्यानें तर आम्हांस विकून टाकिलें आहे, आणि
आमची कमाईहि खाऊन टाकिली आहे. १६ यास्तव
देवानें आमच्या बापापासून जें सर्व धन हिरावून घेतलें
आहे तें आमचें व आमच्या मुलांबाळांचें आहे; तर
आतां देवानें आपणाला सांगितलें आहे तसें करा.

१७ मग याकोबानें उठून आपले पुत्र व बायका यांस
उंटांवर बसविलें; १८ आणि आपलीं सर्व जनावरें, संपादन
केलेलें सर्व धन व पदन-अरामांत मिळविलेलीं गुरेंढोरें
घेऊन तो आपला बाप इसहाक याजकडे कनान देशीं
जावयास निघाला. १९ लाबान या समयीं आपलीं मेंढरें
भादरावयास गेला होता; इकडे राहेलीनें आपल्या बापाच्या
तेराफीम (कुलदेवता) चोरिल्या. २० याप्रमाणें याको-
बानें अरामी लाबानास फसविलें; आपण पळून जात आहों
हें त्यानें त्यास कळूं दिलें नाहीं. २१ मग तो आपलें
सर्व कांहीं घेऊन पळून गेला; तो उठून फरात नदापली-
कडे गेल्यावर गिलाद पर्वताच्या दिशेनें मार्गस्थ झाला.

२२ याकोब पळून गेला हें तिसऱ्या दिवशीं कोणीं
लाबानास सांगितलें. २३ तेव्हां त्यानें आपले भाऊबंद
बरोबर घेऊन त्याचा पाठलाग सात मजलांपर्यंत केला
आणि त्याला गिलाद डोंगरांत गांठिलें. २४ देवानें
अरामी लाबानास रात्रीं स्वप्नांत येऊन सांगितलें कीं
संभाळ, याकोबास बरेंवाईट कांहीं बोलूं नको.
२५ लाबानानें याकोबास गांठिलें तेव्हां याकोबानें
डोंगरांत आपला डेरा दिला होता; लाबानानेंहि
आपल्या भाऊबंदांसह गिलाद डोंगरांत डेरा दिला.
२६ मग लाबान याकोबास म्हणाला, तूं हें काय केलें?
मला फसवून माझ्या कन्या युद्धांत पाडाव केल्या-
प्रमाणें घेऊन आलास. २७ तूं चोरून पळालास, मला
फसविलें, कांहीं कळूं दिले नाही. असें कां केलें? तूं
मला कळविलें असतें तर मीं आनंदानें गाणेंबजावणें
करून, डफ, चंग वगैरे वाद्यें लावून तुला रवाना केलें
असतें. २८ तूं मला आपल्या मुलांबाळांचें चुंबन
घेण्याचीहि सवड दिली नाहीं; हा सर्व तूं मूर्खपणा केला.
२९ तुला अपाय करण्याचें सामर्थ्य मला आहे, पण काल
रात्रीं तुझ्या वडिलांच्या देवानें मला सांगितलें कीं संभाळ,
याकोबास बरेंवाईट कांहीं बोलूं नको. ३० बरें, तुला
आपल्या बापाच्या घराची ओढ लागून तूं आलास तर
आलास, पण माझ्या देवता कां चोरून आणिल्या?
३१ तेव्हां याकोबानें लाबानास उत्तर दिलें, मला भीति
वाटली; मी म्हणालों, कोण जाणे, आपण मजकडून आपल्या
कन्या हिरावून घ्याल. ३२ आपल्या देवता ज्याच्यापाशीं
सांपडतील तो जिवंत राहावयाचा नाहीं; आपण आपल्या
भाऊबंदांदेखत माझा झाडा घेऊन आपलें कांहीं सांपडेल
तर ओळखून खुशाल घ्या. कारण राहेलीनें देवता चोरून
आणिल्या होत्या हें याकोबास माहीत नव्हतें.

३३ तेव्हां लाबान याकोबाच्या डेऱ्यांत, लेआच्या
डेऱ्यांत आणि त्या दोन दासींच्या डेऱ्यांत गेला, परंतु

त्याला कांहीं सांपडलें नाहीं. मग तो लेआच्या डेऱ्यांतून
राहेलीच्या डेऱ्यांत गेला. ३४ राहेल त्या कुलदेवतांच्या
मूर्ति घेऊन व उंटाच्या कंठाळींत ठेवून त्यांवर बसली
होती. लाबानानें सर्व डेरा शोधून पाहिला पण त्यास
कांहीं सांपडलें नाहीं. ३५ ती बापास म्हणाली, स्वामी,
मला आपल्यापुढें उठून उभें राहवत नाहीं म्हणून
रागावूं नका, कारण मला स्त्रीधर्म प्राप्त झाला आहे.
असा त्यानें सर्व शोध केला पण त्यास त्या कुल-
देवता सांपडल्या नाहींत.

३६ तेव्हां याकोबास क्रोध येऊन तो त्याच्याशीं तक्रार
करूं लागला; याकोबानें लाबानास म्हटलें कीं आपण माझ्या
पाठीस लागावें असा कोणता अपराध, कोणतें पातक मीं
केलें? ३७ आपण माझ्या सर्व सामानाचा झाडा घेतला
त्यांत आपल्या घरच्या कांहीं वस्तु सांपडल्या काय?
सांपडल्या असल्यास त्या या माझ्या व आपल्या भाऊबंदां-
समोर ठेवा; त्यांस आपणां दोघांचा निवाडा करूं द्या. ३८
आज वीस वर्षें मी आपल्यापाशीं राहिलों; इतक्या काळांत
आपल्या शेळ्यामेंढ्या गाभडल्या नाहींत व आपल्या
कळपांतले एडके मीं खाल्ले नाहींत. ३९ वनपशूंनीं जीं
फाडून खाल्लीं तीं सदैव आपल्याकडे न आणितां मीं
त्यांच्याऐवजीं दुसरीं भरतीस दिलीं; दिवसारात्रीं चोरीस
गेलेलीं आपण माझ्या हातून भरून घेतलीं. ४० दिवसा
उन्हाचा ताप व रात्रीं गारठा यांनीं मी जर्जर होई; माझ्या
डोळ्यांची झोंप उडे, अशी माझी दशा होती. ४१ गेलीं
वीस वर्षें मीं आपल्या घरीं काढिलीं; चौदा वर्षें आपल्या
दोन्ही कन्यांसाठीं आणि सहा वर्षें आपल्या शेरडांमेंढरां-
साठीं मीं आपली चाकरी केली आणि दहादां आपण
माझ्या मुशाहिऱ्यांत फेरबदल केला. ४२ माझ्या वडिलांचा
देव, अब्राहामाचा देव, इसहाकास पूज्य देव माझ्या
पाठिराखा नसता तर आपण मला रिक्तहस्तें लावून दिलें
असतें. माझें दुःख व माझ्या हातांनीं केलेले कष्ट देवानें
पाहून काल रात्रीं आपणाला धमकाविलें.

४३ यावर लाबान याकोबास म्हणाला, ह्या मुली
माझ्या मुली आहेत, आणि हीं मुलें माझीं मुलें आहेत;
हे कळप आणि जें कांहीं तुझ्या दृष्टीसमोर दिसतें
आहे तें अवघें माझें आहे; आतां ह्या माझ्या मुली
व त्यांच्या पोटचीं मुलें यांस मी काय करूं? ४४
तर चल, तूं आणि मी आपसांत करार करूं; तो तुझ्या-
माझ्यामध्यें साक्षी होवो. ४५ तेव्हां याकोबानें एक धोंडा
घेऊन त्याचा स्तंभ उभारिला. ४६ मग याकोब आपल्या
भाऊबंदांस म्हणाला, धोंडे जमा करा; हें ऐकून त्यांनीं
धोंडे गोळा करून त्यांची रास केली आणि त्या राशीजवळ
ते जेवले. ४७ लाबानानें त्या राशीस यगर-सहदूथा
( साक्षीची रास ) म्हटलें व याकोबानें तिला गलेद
म्हटलें. ४८ लाबानानें याकोबास म्हटलें, आतां ही रास
तुझ्यामाझ्यामध्यें साक्षीला आहे म्हणून हिचें नांव गलेद
( साक्षीची रास ) ठेविलें. ४९ तसेंच मिस्पा हेंहि नांव
तिला दिलें; कारण तो म्हणाला, आपण परस्परांच्या दृष्टी-
आड झालों म्हणजे परमेश्वर तुझामाझा साक्षी असो.
५० तूं माझ्या कन्यांस दुःख दिलें किंवा त्यांखेरीज अन्य
स्त्रिया केल्या तर संभाळ; तुझ्यामाझ्यामध्यें कोणी
मानव नव्हे तर प्रत्यक्ष देव साक्षी आहे. ५१ लाबान
याकोबास आणखी म्हणाला, पाहा, तुझ्यामाझ्यामध्यें
ही रास, हा स्तंभ, मीं उभा केला आहे. ५२ ही रास
हा स्तंभ साक्षी; अनिष्ट करण्याच्या हेतूनें मी ही रास
ओलांडून तुजकडे येणार नाहीं व तूंहि ही रास, हा स्तंभ
ओलांडून मजकडे येऊं नये. ५३ अब्राहामाचा देव,
नाहोराचा देव, त्यांच्या वडिलांचा देव आपणां दोघांचा
न्याय करोत. मग याकोबानें आपला बाप इसहाक
यास पूज्य जो देव त्याची शपथ वाहिली. ५४ नंतर
याकोबानें डोंगरावर यज्ञ केला व आपल्या भाऊबंदांस
भोजनास बोलाविलें; त्यांनीं भोजन करून त्या डोंगरा-
वर रात्र घालविली. ५५ सकाळींच लाबान उठला,
त्यानें आपल्या कन्यापुत्रांचें चुंबन घेऊन त्यांस
आशीर्वाद दिला. मग लाबान निघून स्वस्थानीं परत
गेला.

## ३२

१ इकडे याकोब आपल्या वाटेनें जात
असतां देवदूत त्यास भेटले. २ त्यांस पाहून
याकोब म्हणाला, हें देवाचें सैन्य आहे, म्हणून

१ अथवा: वडिलांचा देव.

त्या ठिकाणाचें नांव त्यानें महनाइम ( दोन सैन्यें )
ठेविलें.
३ मग याकोबानें सेईर देशांत म्हणजे अदोम
प्रांतांत आपला भाऊ एसाव याजकडे जासूद आगाऊ
पाठविले. ४ त्यांस त्यानें आज्ञा दिली कीं माझा
स्वामी एसाव यांस जाऊन सांगा कीं आपला सेवक
याकोब म्हणतो, मी आजवर लाबानापाशीं जाऊन
राहिलों होतों. ५ आतां माझीं गुरें, गाढवें, शेरडां-
मेंढरांचे कळप, दास व दासी आहेत: माझ्या स्वामींची
कृपादृष्टि मजवर व्हावी म्हणून हा निरोप मी पाठवीत
आहें. ६ जासूदांनीं परत येऊन याकोबास सांगितलें,
आम्ही आपला भाऊ एसाव यास जाऊन भेटलों;
तो चारशें मनुष्यें बरोबर घेऊन आपणाला भेटावयास
येत आहे. ७ हें ऐकून याकोब फार भ्याला
व चिंतेंत पडला: आणि आपल्याबरोबर असलेले
लोक, शेरडेंमेंढरें, गुरें व उंट यांच्या त्यानें दोन
टोळ्या केल्या. ८ तो म्हणाला, एसावानें येऊन
एका टोळीवर हल्ला केला तर दुसरी टोळी पळून
निभावेल. ९ मग याकोब म्हणाला, हे परमेश्वरा, माझे
वडील अब्राहाम व इसहाक यांच्या देवा, तूं मला
सांगितलें कीं तूं आपल्या देशीं, आपल्या गोतांत परत
जा: मी तुझें कल्याण करीन. १० तूं करुणा व
सत्यता दाखवून आपल्या दासासाठीं जें कांहीं केलें
आहे त्याला मी पात्र नाहीं: मी आपली फक्त एक
काठी घेऊन ही यार्देन उतरून गेलों होतों, आणि आतां
माझ्या दोन टोळ्या झाल्या आहेत. ११ मला माझा
भाऊ एसाव याच्या हातांतून सोडीव: मला त्याची
भीति वाटते: न जाणों तो येऊन माझ्या बायका-
मुलांना व मला मारून टाकावयाचा. १२ तूं मला वचन
दिलें आहे कीं मी तुझें निश्चयें बरें करीन, आणि
समुद्राच्या अगणित वाळूसारखी तुझी संतति करीन.
१३ त्या रात्रीं तो तेथेंच राहिला: आणि आपल्याजवळ
जें होतें त्यांतून त्यानें आपला भाऊ एसाव याजसाठीं
भेट तयार केली: १४ दोनशें शेळ्या व वीस बोकड,
दोनशें मेंढ्या व वीस एडके १५ तीस दुभत्या
सांडणी व त्यांचीं पोरें, चाळीस गाई व दहा खोंड, वीस
गाढवी व दहा शिंगरें, १६ या एवढ्यांचे त्यानें वेगवेगळे
कळप केले आणि एकेक आपल्या चाकरांच्या स्वाधीन
करून त्यांस सांगितलें, तुम्ही कळपाकळपांत अंतर ठेवून
माझ्यापुढें चालूं लागा. १७ त्यानें सर्वांच्या पुढल्या
चाकरास सांगितलें कीं माझा भाऊ एसाव तुला भेटेल
व विचारील कीं तूं कोणाचा? कोठें चाललास? आणि
हीं हाकून नेत आहेस तीं कोणाचीं? १८ तेव्हां त्याला
सांग कीं आपला सेवक याकोब याचीं हीं आहेत: हीं
त्यानें आपला स्वामी एसाव यांस भेट म्हणून पाठविलीं
आहेत; पाहा, तोहि मागाहून येत आहे. १९ आणि
दुसऱ्यास, तिसऱ्यास आणि इतर सर्व कळप हाकून
नेणाऱ्यांस अशीच आज्ञा करून त्यानें म्हटलें कीं
तुम्हांस एसाव भेटला तर असेंच बोला, २० आणि
सांगा, पाहा, तुझा दास याकोब होहि मागाहून येत
आहे. याकोबाला वाटलें कीं पुढें भेट पाठवून त्यास
शांत केलें व मागाहून त्याचें दर्शन घेतलें तर तो
आपला अंगीकार करील. २१ याप्रमाणें त्याची ती
भेट पुढें गेली व तो त्या रात्रीं तळावर राहिला.
२२ मग तो रात्रींचाच उठून आपल्या दोन
बायका, दोन दासी आणि आपलीं अकरा मुलें
यांस घेऊन यब्बोक नदीच्या उताराने पार गेला.
२३ त्यानें त्यांस नदीपलीकडे उतरून लावलें, आणि
आपलें जें कांहीं होतें तेंहि पाठविलें. २४ याकोब
एकटाच मागें राहिला, तेव्हां कोणा पुरुषानें
त्याच्याशीं पहाट होईपर्यंत झोंबी केली. २५ याकोबावर
आपली सरशी होत नाहीं हें पाहून त्यानें त्याच्या
जांघेस स्पर्श केला तों याकोब त्याच्याशीं झोंबी करीत
असतां ती उखळली. २६ मग तो म्हणाला, पहाट
होत आहे, मला जाऊं दे. तो म्हणाला, तूं मला
आशीर्वाद दिल्यावांचून मी तुला जाऊं द्यावयाचा नाहीं.
२७ त्यानें मग त्यास विचारिलें, तुझें नांव काय? तो
म्हणाला, याकोब. २८ यावर तो त्यास म्हणाला,
यापुढें तुला याकोब म्हणणार नाहींत, तर इस्राएल
म्हणतील, कारण तूं देवाशीं व मनुष्यांशीं झटोन

झगडून जय पावला आहेस. २९ मग याकोबानें
विचारिलें, तुझें नांव काय तें सांग. तो म्हणाला,
माझें नांव कां पुसतोस ? असें म्हणून त्यानें त्यास
आशीर्वाद दिला. ३० मग याकोबानें त्या ठिकाणचें
नांव पनीएल (देवाचें मुख) असें ठेविलें, कारण तो
म्हणाला, मीं देवाचें मुख प्रत्यक्ष पाहूनहि माझा प्राण
वांचला. ३१ तो पनीएल सोडून चालला असतां
सूर्योदय झाला; आणि तो आपल्या मांडीमुळें लंगडत
चालला; ३२ म्हणून इस्राएल लोक जनावरांच्या
जांघेचा स्नायु आजवर खात नाहींत; याचें कारण हेंच
कीं त्यानें याकोबाच्या जांघेच्या स्नायूला स्पर्श केला.

## ३३

१ यानंतर याकोबानें दृष्टि वर करून पाहिलें
तों एसाव चारशें माणसें बरोबर घेऊन येत
आहे असें त्याला दिसलें; तेव्हां त्यानें लेआ व
राहेल आणि त्या दोन दासी यांच्या हवालीं मुलें
केलीं. २ त्यानें दासी व त्यांचीं मुलें सर्वांपुढें,
त्यांच्यामागून लेआ व तिचीं मुलें आणि सर्वांमागून
राहेल व योसेफ यांना चालविलें. ३ तो स्वतः त्या
सर्वांच्या पुढें चालत गेला, आणि भावाजवळ जाऊन
पोहंचेपर्यंत त्यानें सात वेळां भूमीपर्यंत लवून नमन
केलें. ४ तेव्हां एसावानें धावत जाऊन त्यास आलिं-
गन दिलें; त्यानें त्याच्या मानेवर मान ठेवून त्याचें
चुंबन घेतलें, आणि ते उभयतां रडले. ५ एसावानें
दृष्टि वर करून बायकामुलें पाहिलीं तेव्हां तो
म्हणाला, तुजबरोबर हीं कोण ? तो म्हणाला, देवानें
आपल्या ह्या दासावर कृपा करून दिलेलीं हीं मुलें
होत. ६ तेव्हां त्या दासींनीं मुलांसह जवळ येऊन
त्यास नमन केलें. ७ मग लेआ व तिचीं मुलें यांनींहि
जवळ येऊन त्याला नमन केलें, आणि त्यांच्यामागून
योसेफ व राहेल यांनीं जवळ येऊन त्यास नमन केलें.
८ मग त्यानें म्हटलें, मला तुझी ही मंडळी भेटली
याचा अर्थ काय ? तो म्हणाला, माझ्या स्वामीची
कृपादृष्टि व्हावी म्हणून. ९ एसाव म्हणाला, माझ्या-
पाशीं विपुल आहे, माझ्या बंधो, तुझें तुलाच
राहूं दे. १० याकोब म्हणाला, नाहीं, नाहीं; आपला
मजवर प्रसाद झाला असेल तर माझ्या हातची एवढी
भेट घ्याच, कारण आपलें दर्शन मला झालें हें जणो
देवाच्या दर्शनासारखें आहे आणि आपण मजवर प्रसन्न
झालां आहां. ११ तर आपल्यासाठीं आणलेली ही माझी
भेट घ्याच; कारण देवानें मजवर प्रसाद केल्यामुळें
मला सर्व कांहीं भरपूर मिळालें आहे; असें म्हणून
त्याला फार आग्रह केल्यावर त्यानें ती भेट
घेतली. १२ मग एसाव त्याला म्हणाला, चला, आपण
वाटेस लागून पुढें जाऊं, मी तुझ्यापुढें चालतों.
१३ याकोब त्यास म्हणाला, माझ्या स्वामीला ठाऊक
आहे कीं हीं मुलें सुकुमार आहेत; आणि वत्सांस
दूध पाजणाऱ्या शेळ्यामेंढ्या व गाई यांचें मला
पाहिलें पाहिजे; त्यांची एक दिवस फाजील दौड
केली तर अवघा कळप मरून जाईल. १४ तर
स्वामी, आपण आपल्या दासास सोडून पुढें जा, आणि
माझीं गुरें, मेंढरें व मुलें यांच्यानें चालवेल तसा मी
हळूहळू चालून सेईर येथें माझ्या स्वामीकडे येईन.
१५ मग एसाव म्हणाला, माझ्या लोकांपैकीं कांहीं
तुजबरोबर ठेवूं काय ? तो म्हणाला, कशाला ? माझ्या
स्वामीची कृपादृष्टि मजवर असली म्हणजे पुरें.
१६ हें ऐकून एसाव त्याच दिवशीं सेईरास परत
जावयास निघाला. १७ याकोब मजल करीत
सुक्कोथास गेला; तेथें त्यानें आपणासाठीं घर बांधिलें
व आपल्या गुरांढोरांसाठीं खोपट्या केल्या, म्हणून त्या
ठिकाणाचें नांव सुक्कोथ (खोपट्या) पडलें.
१८ मग याकोब पदन-अरामाहून निघाला तो कनान
देशांतील शखेम नामक नगरास सुखरूप पोहंचला, आणि
नगराबाहेर तळ देऊन राहिला. १९ जेथें त्यानें डेरा
दिला होता तेथील कांहीं जमीन त्यानें शखेमाचा
बाप हमोर याच्या वंशजांकडून शंभर कसीतो[1] देऊन
विकत घेतली; २० आणि तेथें त्यानें एक वेदी बांधून
तिचें नांव एल-एलोहे-इस्राएल (देव, इस्राएलाचा देव)
असें ठेविलें.

---

१. एक विशिष्ट वजनाचें रुप्याचें नाणें.

३४ १ एके दिवशीं याकोबापासून लेआ हिला
झालेली कन्या दीना त्या देशांतील स्त्रियांस भेटा-
वयास गेली. २ तेव्हां त्या देशाचा अधिपति
हमोर नामें हिव्वी याचा पुत्र शखेम याची नजर
तिजवर गेली आणि तो तिला घेऊन गेला व तिजपाशीं
निजून त्यानें तिला भ्रष्ट केलें. ३ याकोबाची कन्या
दीना हिजवर त्याचें मन बसलें; त्याचें त्या मुलीवर
प्रेम जडलें आणि त्यानें तिच्या मनास धीर दिला.
४ मग शखेम हमोरास म्हणाला, मला ही मुलगी
बायको करून दे. ५ त्यानें आपली कन्या दीना हीस
भ्रष्ट केलें हें वर्तमान याकोबाच्या कानावर आलें तेव्हां
त्याचे पुत्र रानांत गुरांबरोबर होते ते परत येत
तोंवर याकोब गप्प राहिला. ६ इकडे शखेमाचा बाप
हमोर बोलणें करावयासाठीं याकोबाकडे आला. ७ तें
वर्तमान ऐकून याकोबाचे पुत्र रानांतून घरीं आले;
शखेमानें करूं नये तें केलें म्हणजे याकोबाच्या कन्येपाशीं
निजून त्यानें इस्राएलाशीं भ्रष्टाचार केला म्हणून त्यांस
मनस्वी दुःख होऊन ते फार संतापले. ८ हमोरानें त्यांज-
शीं असें बोलणें लाविलें कीं माझा पुत्र शखेम याचा जीव
तुमच्या कन्येकडे लागला आहे तर ती त्याला बायको करून
द्याच. ९ तुम्ही आम्हांशीं सोयरसंबंध करा; तुमच्या
कन्या आम्हांस द्या व आमच्या कन्या तुम्ही करा.
१० आमच्यांत वस्ती करून राहा; हा देश तुम्हांस
खुला आहे; त्यांत राहा, व्यापार करा व वतनें संपादा.
११ शखेम दीनेच्या बापास व भावांस म्हणाला, मजवर
एवढी कृपादृष्टि करा म्हणजे तुम्ही मागाल तें मी देईन.
१२ वाटेल तो मोबदला व आंदण मजपाशीं मागा,
तुम्ही मागाल तें मी देईन; तेवढी मुलगी मला बायको
करून द्या. १३ आपली बहीण दीना शखेमानें भ्रष्ट
केली म्हणून याकोबाच्या पुत्रांनीं मनांत डाव धरून
त्यास व त्याचा बाप हमोर यांस उत्तर दिलें; १४ ते
त्यांस म्हणाले, बेसुनत मनुष्यास आमची बहीण देणें
हें आमच्या हातून होणार नाहीं, आम्हांस बट्टा लागेल;
१५ तुमच्या सर्व पुरुषांची सुंता करून तुम्हीं आम्हां-
सारखें व्हावें; याच अटीवर आम्ही तुमचें म्हणणें
मान्य करूं. १६ असें झाल्यास आम्ही आमच्या कन्या
तुम्हांस देऊं, तुमच्या कन्या आम्ही करूं, आणि
आमची वस्ती तुमच्याबरोबर होऊन आपण एक राष्ट्र
बनूं; १७ पण सुंता करण्याच्या बाबतींत तुम्ही आमचें
न ऐकाल तर आम्ही आमच्या कन्येस घेऊन जाऊं.

१८ त्यांचें हें म्हणणें हमोर व त्याचा पुत्र शखेम यांस
मान्य झालें. १९ त्या तरुणानें तसें करण्यास विलंब
लाविला नाहीं, कारण याकोबाच्या कन्येवर त्याचें
मन बसलें होतें; त्याचा मान त्याच्या बापाच्या
घराण्यांतल्या सर्वांहून मोठा होता. २० त्यावर
हमोर व त्याचा पुत्र शखेम यांनीं आपल्या
नगराच्या वेशीपाशीं जाऊन नगरवासी लोकांशीं असें
बोलणें लाविलें कीं, २१ हीं माणसें आपल्याबरोबर
सलोख्यानें राहणारीं आहेत, तर यांस देशांत
राहून व्यापारउदीम करूं द्या; पाहा, त्यांस वस्ती
करून राहण्यास पुरे इतका हा देश विस्तीर्ण आहे;
आपण त्यांच्या मुली बायका करूं आणि आपल्या
मुली त्यांस देऊं. २२ आपल्यांत राहून एक राष्ट्र
होण्यास ते ज्या अटीवर मान्य आहेत ती हीच कीं त्यांची
सुंता झाली आहे तशी आपल्यांतल्या सर्व पुरुषांची
सुंता व्हावी. २३ हें केल्यास त्यांचे कळप, मालमत्ता
आणि त्यांचीं सगळीं जनावरें हीं आपलीं नाहींत का
होणार? एवढें त्यांचें म्हणणें मान्य करूं या, म्हणजे ते
आपल्यांत वस्ती करून राहतील. २४ हमोर व त्याचा
पुत्र शखेम यांचें म्हणणें वेशींतून येणाऱ्याजाणाऱ्या
सर्वांनीं ऐकलें; मग त्या नगराच्या वेशींतून येणाऱ्या-
जाणाऱ्या सर्व पुरुषांची सुंता झाली. २५ आणखी
असें झालें कीं तिसऱ्या दिवशीं ते बेजार असतां याकोबाचे
दोन पुत्र म्हणजे दीनेचे भाऊ शिमोन व लेवी
यांनीं आपआपली तरवार हातीं घेऊन त्या शहरावर
अवचित छापा घातला आणि तेथल्या सर्व पुरुषांची
कत्तल केली. २६ हमोर व त्याचा पुत्र शखेम यांचाहि
तरवारीनें वध करून ते दीनेस शखेमाच्या घरांतून
काढून घेऊन गेले. २७ हा असा वध केल्यावरहि
याकोबाच्या पुत्रांनीं त्या वध केलेल्यांवरून जाऊन तें

शहर लुटिलें. कारण त्यांनीं त्यांची बहीण दीना हिला
भ्रष्ट केलें होतें. २८ त्यांचीं शेरडेंमेंढरें, गाईबैल,
गाढवें आणि त्या शहरांतलें व शेतांतलें होतेंनव्हतें
तें सारें तें घेऊन गेले. २९ त्यांचें अवघें धन,
त्यांचीं सर्व मुलेंबाळें व स्त्रिया आणि त्यांच्या घरांत
जें कांहीं सांपडलें तें सगळें हस्तगत करून त्यांनीं
लुटलें. ३० तेव्हां शिमोन व लेवी यांस याकोब
म्हणाला, या देशाचे रहिवासी कनानी व परिज्जी
यांस माझा वीट येईल असें तुम्हीं करून मला
संकटांत घातलें आहे; माझे लोक मूठभर आहेत,
म्हणून ते मजवर येऊन माझी कत्तल करितील आणि
माझा व माझ्या घराण्याचा फडशा उडवितील. ३१
ते म्हणाले, त्यांनीं आमच्या बहिणीशीं वेश्येप्रमाणें
*व्यवहार करावा कीं काय ?*

१ मग देवानें याकोबाला सांगितलें कीं
३५ *ऊठ, वर जाऊन बेथेल येथें राहा; आणि तूं*
आपला भाऊ एसाव याच्यापुढून पळून चालला
असतांना ज्या देवानें तुला दर्शन दिलें होतें
त्याजप्रीत्यर्थ तेथें वेदी बांध. २ मग याकोब आपल्या
घरच्या मंडळींस व आपल्याबरोबरच्या सगळ्या
माणसांस म्हणाला, तुमच्यापाशीं जे अन्य देव आहेत
ते सर्व फेकून द्या व शुचिर्भूत होऊन आपलीं
वस्त्रें बदला. ३ आपण येथून वर बेथेलास जाऊं;
तेथें मी देवाप्रीत्यर्थ वेदी बांधीन; त्यानें माझ्या
संकटसमयीं माझें ऐकलें; आणि ज्या वाटेनें मी प्रवास
करीत होतों तींत तो मजबरोबर होता. ४ तेव्हां
*त्यांनीं आपल्यापाशीं असलेले अन्य देव आणि*
आपल्या कानांत असलेलीं कुंडलें याकोबाच्या हवालीं
केलीं; आणि याकोबानें शखेमाजवळ असलेल्या एला
वृक्षाखालीं तीं पुरून टाकिलीं. ५ मग त्यांनीं कूच केलें;
आणि आसपासच्या नगरांतल्या लोकांच्या मनांत
देवानें अशी दहशत उत्पन्न केली कीं ते याकोब-
पुत्रांच्या पाठीस लागले नाहींत. ६ ह्या प्रकारें याकोब
आपल्याबरोबरच्या सर्व लोकांसह कनान देशांत लूज
म्हणून शहर आहे (हेंच बेथेल) तेथें येऊन पोहंचला.
७ तेथें त्यानें एक वेदी बांधिली व त्या स्थलास एल-
बेथेल (बेथेलचा देव) हें नांव दिलें; कारण तो
आपल्या भावापासून पळून चालला असतां येथेंच देव
त्याला प्रगट झाला होता. ८ तेथें रिबकेची दाई
दबोरा ही मरण पावली व तिला बेथेलच्या खालच्या
बाजूस अल्लोन वृक्षाखालीं पुरिलें; ह्या वृक्षाला
अल्लोन-बाकूथ (रुदनवृक्ष) असें नांव ठेविलें.

९ याकोब पदन-अरामाहून परत आल्यावर देवानें
त्याला पुनः दर्शन देऊन वर दिला. १० देव त्याला
म्हणाला, तुझें नांव याकोब आहे; पण इतःपर तुला
याकोब म्हणणार नाहींत, तर तुला इस्राएल हें नांव
प्राप्त होईल; आणि देवानें त्याला इस्राएल हें नांव
दिलें. ११ देव त्याला आणखी म्हणाला, मी सर्वसमर्थ
देव आहें; तूं फलद्रूप होऊन बहुगुणित हो; तुजपासून
एक राष्ट्रच काय, तर राष्ट्रसमूह उत्पन्न होईल; आणि तुझ्या
पोटीं राजे निर्माण होतील. १२ आणि जो देश मीं अब्रा-
हाम व इसहाक यांस दिला तो तुला देईन आणि
तुझ्यामागें तुझ्या संततीसहि तो देईन. १३ मग देवानें
जेथें याकोबाशीं भाषण केलें होतें तेथूनच आरोहण केलें;
१४ आणि जेथें देवानें याकोबाशीं भाषण केलें होतें तेथें
त्यानें एक पाषाणस्तंभ उभा केला आणि त्यावर
पेयार्पण करून त्यास तैलाभ्यंग केला. १५ जेथें
देवानें याकोबाशीं भाषण केलें होतें त्या स्थलाचें नांव
याकोबानें बेथेल ठेविलें.

१६ मग त्यानें बेथेलाहून कूच केलें आणि
एफ्राथ गांव कांहींसा दूर असतां राहेलीस असह्य
प्रसूतिवेदना होऊं लागल्या. १७ अशा प्रसूति-
वेदना होत असतां सुईण तिला म्हणाली, भिऊं
नको, कारण हाहि पुत्रच आहे. १८ ती तर मरण
पावली. तिचा प्राण जातांजातां तिनें मुलाचें नांव
बेन-ओनी (माझ्या दुःखाचा पुत्र) ठेविलें; तथापि
त्याच्या बापानें त्याचें नांव बन्यामीन (माझ्या
उजव्या हाताचा पुत्र) असें ठेविलें. १९ ह्याप्रमाणें
राहेल मरण पावली आणि एफ्राथ (हेंच बेथलहेम)
गांवाच्या वाटेवर तिला पुरिलें. २० मग याकोबानें

तिच्या कबरेवर एक स्तंभ उभारला; तो राहेलीच्या
कबरेवरचा स्तंभ आजवर कायम आहे.
२१ नंतर इस्राएलानें कूच करून एदेर कोटाच्या पलीकडे
आपला डेरा दिला. २२ इस्राएल त्या प्रदेशांत राहत असतां
रऊबेन हा आपल्या बापाची उपपत्नी बिल्हा हिजपाशीं
गेला, हें इस्राएलाच्या कानावर गेलें.
याकोबास बारा पुत्र होते; २३ लेआ हिचे पुत्र:
याकोबाचा ज्येष्ठ पुत्र रऊबेन आणि शिमोन, लेवी,
यहूदा, इस्साखार व जबुलून; २४ राहेलीचे पुत्र:
योसेफ व बन्यामीन; २५ राहेलीची दासी बिल्हा
हिचे पुत्र: दान व नफताली; २६ आणि लेआची
दासी जिल्पा हिचे पुत्र: गाद व आशेर; हे याकोबाचे
पुत्र त्याला पदन–अरामांत झाले. २७ मग किर्याथ
अरबा म्हणजे हेब्रोन येथील मम्रे नामक राईत याकोब
आपला पिता इसहाक याजकडे गेला; तेथेंच अब्राहाम
व इसहाक हे पूर्वी वस्तीस होते.
२८ इसहाकाचें वय एकशेंऐशीं वर्षांचें होऊन २९
त्याचें प्राणोत्क्रमण झालें; तो वृद्ध व पुऱ्या वयाचा होऊन
मृत्यु पावला आणि स्वजनांस जाऊन मिळाला; त्याचे पुत्र
एसाव आणि याकोब यांनीं त्यास मूठमाती दिली.

३६ १ एसाव म्हणजे अदोम याची वंशावळ :—
२ एसावानें कनानी कन्यांतून बायका केल्या.
एलोन हित्ती याची कन्या आदा, सिबोन हिव्वी
याची नात म्हणजे अनाची कन्या अहलीबामा,
३ आणि इश्माएलाची कन्या, नबायोथाची बहीण
बासमाथ या बायका त्यानें केल्या. ४ एसावापासून
आदेला अलीपाज व बासमाथेला रगुवेल हे पुत्र झाले;
५ आणि अहलीबामेस यऊश, यालाम व कोरह हे
झाले. हे एसावाचे पुत्र; हे त्यास कनान देशांत झाले.
६ मग एसाव आपल्या स्त्रिया, पुत्र, कन्या, आपल्या
घरचीं सर्व माणसें, आपलीं गुरेंढोरें व इतर जनावरें,
आणि कनान देशांत संपादिलेलें धन हीं सर्व घेऊन
याकोब राहत होता तेथून दूर देशीं निघून गेला.
७ कारण त्यांची संपत्ति एवढी वाढली कीं त्यांस एकत्र
राहण्याची सोयच नव्हती; तसेंच त्यांचीं गुरेंढोरें फार
वाढल्यामुळें ज्या देशांत ते उपरी होते तेथें तेवढ्यांचा
समावेश होईना. ८ म्हणून एसाव सेईर नामक पहाडी
प्रदेशांत वस्ती करून राहिला. एसाव हाच अदोम.
९ सेईर नामक पहाडी प्रदेशांत राहणाऱ्या अदोमी
लोकांचा मूळपुरुष एसाव याची वंशावळ :—
१० एसावाच्या पुत्रांचीं नांवें हीं: एसावाची बायको
आदा हिचा पुत्र अलीपाज आणि एसावाची बायको
बासमाथ हिचा पुत्र रगुवेल. ११ अलीपाज याचे पुत्र
तेमान, ओमार, सपो, गाताम आणि कनाज हे
होते. १२ एसावाचा पुत्र अलीपाज याची तिम्ना
म्हणून एक उपपत्नी होती, तिच्या पोटीं त्याला अमा-
लेक झाला. एसावाची बायको आदा हिचा हा वंश.
१३ रगुवेलाचे पुत्र नहाथ, जेरह, शाम्मा व मिज्जा हे
होते; एसावाची बायको बासमाथ हिचा हा वंश.
१४ सिबोनाची कन्या अना, हिची कन्या अहलीबामा
ही जी एसावाची बायको तिच्यापासून एसावाला
यऊश, यालाम व कोरह हे पुत्र झाले.
१५ एसाववंशांतले सरदार झाले ते हे: एसावाचा
वडील पुत्र अलीपाज, याचे पुत्र सरदार तेमान, सरदार
ओमार, सरदार सपो, सरदार कनाज, १६ सरदार कोरह,
सरदार गाताम व सरदार अमालेक; अदोम देशांत
अलीपाज याच्या पोटीं हे सरदार झाले. हे आदेचे
पुत्र. १७ एसावाचा पुत्र रगुवेल याचे पुत्र हे: सर-
दार नहाथ, सरदार जेरह, सरदार शाम्मा व सरदार
मिज्जा, हे सरदार रगुवेलास अदोम देशीं झाले;
एसावाची बायको बासमाथ हिचे हे पुत्र. १८ एसावाची
बायको अहलीबामा, हिचे पुत्र हे: सरदार यऊश,
सरदार यालाम व सरदार कोरह; हे सरदार एसावाची
बायको अहलीबामा, अनाची कन्या, हिला झाले.
१९ अदोम म्हणजे एसाव याचा हा वंश, त्यांतले
सरदार हे होत.
२० सेईर होरी याचे जे पुत्र त्या देशीं राहत होते ते
हे: लोटान, शोबाल, सिबोन व अना, २१ दिशोन,
एसर व दीशान; हे अदोम देशांत सेईराचे होरी
वंशांतले सरदार होत. २२ लोटानाचे पुत्र होरी व

हेमाम हे होत; लोटानाची बहीण तिम्ना ही होती.
२३ शोबालाचे पुत्र अलवान, मानहाथ, एबाल, शपो
व ओनाम हे होते. २४ सिबोनाचे पुत्र अय्या व अना
हे होते. आपला बाप सिबोन याचीं गाढवें राखीत
असतां ज्याला रानांत उष्णोदकाचे झरे सांपडले तोच
हा अना. २५ अनाचा पुत्र दिशोन व कन्या अहली-
बामा. २६ दीशानाचे पुत्र हेम्दान, एश्बान, यित्रान
व करान हे होत. २७ एसराचे पुत्र बिल्हान, जावान
व अकान हे होत. २८ दीशानाचे पुत्र ऊस व अरान
हे होत. २९ होऱ्यांपैकीं जे सरदार झाले ते हे:
सरदार लोटान, सरदार शोबाल, सरदार सिबोन, सरदार
अना, ३० सरदार दीशोन, सरदार एसर, सरदार
दीशान; सेईर देशांतील होऱ्यांचे सरदार हे होत.

३१ इस्राएल लोकांवर कोणीं राजानें राज्य करण्या-
पूर्वी अदोम देशावर ज्या राजांनीं राज्य केलें ते हे:
३२ बौराचा पुत्र बेला यानें अदोमांत राज्य केलें;
त्याची राजधानी दिन्हाबा हें नगर होतें. ३३ बेला
मेल्यावर बस्रा येथला जेरहाचा पुत्र योबाब त्याच्या
गादीवर बसला. ३४ योबाब मेल्यावर तेमानी यांच्या
देशचा हुशाम त्याच्या गादीवर बसला. ३५ हुशाम
मेल्यावर बदाद याचा पुत्र हदाद त्याच्या गादीवर
बसला; यानेंच मवाब मैदानांत मिद्यान्यांचा मोड
केला; त्याची राजधानी अवीत शहर होतें. ३६ हदाद
मेल्यावर मास्रेका येथील साम्ला त्याच्या गादीवर बसला.
३७ साम्ला मेल्यावर फरात नदाच्या तीरीं रहोबोथ
नामक नगर होतें तेथला शौल त्याच्या गादीवर बसला.
३८ शौल मेल्यावर अकबोराचा पुत्र बाल-हानान
त्याच्या गादींवर बसला. ३९ अकबोराचा पुत्र बाल-
हानान हा मेल्यावर हदार त्याच्या गादीवर बसला;
त्याची राजधानी पाऊ होती. त्याच्या बायकोचें नांव
महेटाबेल; ही मे-जाहाबाची कन्या जी मात्रेद तिची
कन्या होती.

४० एसाववंशांतील सरदारांचीं कुळें व स्थानें यांवरून
जीं नांवें मिळालीं तीं हीं होत: सरदार तिम्ना, सरदार
आल्वा, सरदार यतेथ, ४१ सरदार अहलीबामा, सरदार
एला, सरदार पीनोन, ४२ सरदार कनाज, सरदार तेमान,
सरदार मिब्सार, ४३ सरदार माग्दीएल व सरदार ईराम;
अदोम वंशांतल्यांनीं जो देश वतन करून घेतला,
त्यांतल्या त्यांच्या वस्तीप्रमाणें त्यांचे हे सरदार होत.
अदोमी लोकांचा मूळपुरुष एसाव याचा हा वृत्तांत.

## ३७

१ याकोब कनान देशांत वस्ती करून
राहिला; तेथेंच त्याचा बापहि उपरी म्हणून
राहिला होता. २ याकोबवंशाचें वृत्त हें:
योसेफ सतरा वर्षांचा असतां आपल्या भावांबरोबर
कळप चारीत असे; तो मुलगा आपल्या पित्याच्या स्त्रिया
बिल्हा व जिल्पा यांच्या पुत्रांबरोबर असे; तेव्हां
त्यानें त्यांच्या दुर्वर्तनाविषयींची खबर आपल्या बापास
दिली. ३ इस्राएल आपल्या सर्व पुत्रांहून योसेफावर
फार प्रीति करीत असे, कारण तो त्याचा वृद्धाप-
काळचा पुत्र होता; त्यानें त्याजसाठीं पायघोळ झगा
केला होता. ४ आपला बाप आपल्या इतर सर्व भावां-
हून त्याजवर अधिक प्रीति करितो हें पाहून ते त्याचा
द्वेष करूं लागले, व त्याच्याशीं सलोख्याचें भाषण
करीनातसे झाले.

५ योसेफाला एक स्वप्न पडलें, तें त्यानें त्यांस सांगि-
तलें तेव्हां तर ते त्याचा अधिकच द्वेष करूं लागले. ६ तो
त्यांस म्हणाला, मला पडलेलें स्वप्न ऐका: ७ पाहा, आपण
शेतांत पेंढ्या बांधीत होतों तों माझी पेंढी उठून उभी
राहिली; तेव्हां तुमच्या पेंढ्या माझ्या पेंढीसभोंवतीं उभ्या
राहिल्या व त्यांनीं तिला वंदन केलें. ८ हें ऐकून त्याचे भाऊ
त्यास म्हणाले, काय, तूं आम्हांवर राज्य करणार? तूं आम्हां-
वर सत्ता करणार? आणि त्याच्या स्वप्नांमुळें व भाषणामुळें
तर ते त्याचा अधिकच द्वेष करूं लागले. ९ पुढें त्याला
आणखी एक स्वप्न पडलें, तेंहि त्यानें आपल्या भावांस
सांगितलें; तो म्हणाला, पाहा, मला आणखी एक स्वप्न
पडलें, तें असें कीं, सूर्य, चंद्र व अकरा नक्षत्रें यांनीं
मला वंदन केलें. १० त्यानें हें आपल्या बापास व
भावांस सांगितलें; तेव्हां त्याचा बाप त्याचा निषेध
करून म्हणाला, हें कसलें स्वप्न तुला पडलें? काय,
मी, तुझी आई व तुझे बंधु हे भूमीपर्यंत लवून तुला

वंदन करण्यास तुजपुढें येणार? ११ त्याचे भाऊ
त्याचा हेवादेवा करूं लागले, पण त्याचें म्हणणें
बापानें मनांत ठेविलें. १२ यानंतर त्याचे भाऊ
कळप चारावयास शखेमास गेले. १३ मग इस्राएल
योसेफास म्हणाला, तुझे भाऊ शखेमास कळप चारीत
आहेत ना? तर चल, मी तुला त्यांजकडे पाठवितों.
तो म्हणाला, हा मी तयार आहें; १४ आणि त्यानें
त्यास सांगितलें, जा, तुझे भाऊ आणि कळप कसे
काय आहेत याचा समाचार घेऊन मला बातमी
आण. याप्रमाणें त्यानें त्यास हेब्रोन खिंडींतून रवाना
केलें व तो शखेमास जाऊन पोहंचला. १५ तो तेथें
इकडे तिकडे भटकत असतां एका मनुष्यास आढळला,
तेव्हां त्यानें त्यास विचारिलें, तूं काय शोधीत आहेस?
१६ तो म्हणाला, मी आपल्या भावांना शोधीत
आहें; ते कोठें कळप चारीत आहेत तेवढें मला सांग.
१७ तो मनुष्य म्हणाला, ते येथून निघून गेले आहेत;
आपण दोथानास जाऊं असें त्यांस बोलतांना मीं ऐकलें.
मग योसेफ आपल्या भावांचा शोध काढीत गेला व
ते त्यास दोथान येथें सांपडले.

१८ त्यास दुरून येतांना त्यांनीं पाहिलें तेव्हां तो
त्यांच्याजवळ येऊन पोहंचण्यापूर्वी त्याला कपटानें मारून
टाकण्याचा त्यांनीं बेत केला. १९ ते एकमेकांस म्हणाले,
पाहा, तो स्वप्नदर्शी येत आहे; २० तर चला, आपण
त्याला ठार करून एका खाच्यांत टाकून देऊं, आणि मग
सांगूं कीं कोणा हिंस्र श्वापदानें त्याला खाऊन टाकिलें;
मग पाहूं त्याच्या स्वप्नांचें काय होतें तें. २१ हें रऊबेन
याच्या कानीं आलें; तेव्हां त्यानें त्यांच्या हातांतून त्यास
सोडविलें; तो त्यांस म्हणाला, आपण त्याचा प्राण घेऊं
नये. २२ रऊबेन त्यांस म्हणाला, रक्तपात करूं नका, या
रानांतल्या खाच्यांत त्याला टाका, पण त्याजवर हात
टाकूं नका. त्यांच्या हातांतून सोडवून त्यास बापाकडे
परत पाठवून यावें म्हणून तो असें म्हणाला.
२३ योसेफ आपल्या भावांपाशीं पोहंचला, तेव्हां
त्याच्या अंगांत पायघोळ झगा होता तो त्यांनीं
काढून घेतला, २४ आणि त्याला धरून खाच्यांत
टाकून दिलें; तो खाडा कोरडा होता, त्यांत पाणी
नव्हतें.

२५ मग ते शिदोरी खावयास बसले असतां, त्यांनीं
वर नजर करून पाहिलें तों इस्माएली लोकांचा एक
काफला उंटांवर मसाला, ऊद व गंधरस लादून
गिलादाहून मिसरास जात आहे असें त्यांस दिसलें.
२६ तेव्हां यहूदा आपल्या बंधूंस म्हणाला, आपण
आपल्या भावास ठार मारून त्याचा खून छपविला तर
लाभ काय? २७ चला, आपण त्यास या इस्माएली
लोकांस विकून टाकूं; आपला हात त्याजवर पडूं
नये; कसें झालें तरी तो आपला बंधु, आपल्या
हाडामांसाचा आहे. हें त्याच्या बंधूंस पसंत वाटलें.
२८ ते मिद्यानी व्यापारी जवळून चालले तेव्हां
त्यांनीं योसेफास त्या खाच्यांतून ओढून बाहेर
काढिलें आणि त्या इस्माएली लोकांस वीस रुपयांस
विकून टाकिलें. ते योसेफास मिसर देशांत घेऊन गेले.

२९ रऊबेन खाच्याकडे परत येऊन पाहतो तों योसेफ
खाच्यांत नाहीं, म्हणून त्यानें आपलीं वस्त्रें फाडिलीं. ३०
तो आपल्या बंधूंकडे परत येऊन म्हणाला, मुलगा तर
नाहीं; आतां मी कोठें जाऊं? ३१ मग त्यांनीं योसेफाचा
झगा घेतला व एक बकरा मारून तो झगा त्याच्या
रक्तांत भिजविला; ३२ मग त्यांनीं तो पायघोळ
झगा पाठवून दिला; तो त्यांनीं आपल्या बापाकडे
आणून म्हटलें कीं हा आम्हांस सांपडला; हा आपल्या
पुत्राचा झगा आहे कीं काय तें ओळखा. ३३ त्यानें
तो ओळखून म्हटलें, हा माझ्या मुलाचाच झगा! हिंस्र
श्वापदानें त्यास खाल्लें, योसेफाला फाडून टाकिलें यांत
संशय नाहीं. ३४ तेव्हां याकोबानें आपलीं वस्त्रें
फाडून कंबरेस गोणताट गुंडाळिलें आणि आपल्या
पुत्रासाठीं पुष्कळ दिवस शोक केला. ३५ त्याचे
पुत्र व कन्या हीं सर्व त्याचें सांत्वन करावयास त्याच्या-
जवळ गेलीं, पण तो कांहीं केल्या समाधान न
पावतां म्हणाला, मी शोक करीत करीत अधोलोकीं
आपल्या पुत्राकडे जाईन. असा त्याच्या बापानें त्याज-
साठीं शोक केला.

३६ मिद्यानी लोकांनीं योसेफास मिसरांत नेऊन
पोटीफर नामक फारोचा एक अंमलदार, गारद्यांचा
सरदार होता, त्यास विकून टाकिलें.

## ३८

१ या सुमारास यहूदा आपल्या भावांस
सोडून खालच्या प्रदेशीं गेला आणि अदुल्लाम-
कर हीरा नामक मनुष्याच्या घरीं जाऊन
राहिला. २ तेथें शूवा नांवाच्या एका कनानी
मनुष्याची कन्या त्याच्या दृष्टीस पडली; त्यानें तिला
बायको करून तो तिजपाशीं गेला. ३ ती गर्भवती
होऊन तिला पुत्र झाला, त्यानें त्याचें नांव एर ठेविलें.
४ ती पुनः गर्भवती होऊन तिला पुत्र झाला; तिनें त्याचें
नांव ओनान ठेविलें; ५ पुनः तिला एक पुत्र झाला
त्याचें नांव तिनें शेला ठेविलें. तो झाला तेव्हां यहूदा
कजीब येथें राहत होता. ६ मग यहूदानें आपला
ज्येष्ठ पुत्र एर याला बायको करून दिली, तिचें नांव
तामार असें होतें; ७ पण यहूदाचा ज्येष्ठ पुत्र एर
हा परमेश्वराच्या दृष्टीनें दुष्ट होता म्हणून परमेश्वरानें
त्याला मारून टाकिलें. ८ मग यहूदा ओनान यास
म्हणाला, आपल्या भावजयीपाशीं जा आणि दिराच्या
धर्मास अनुसरून भावाचा वंश चालीव; ९ पण ओनान
यास ठाऊक होतें कीं संतति झाली तर ती आपली
होणार नाहीं, म्हणून तो आपल्या भावजयीपाशीं जाई
तेव्हां आपलें वीर्य जमिनीवर पाडी; हेतु हाच कीं,
आपल्या भावाला आपलें बीज देऊं नये. १० हें
त्याचें कृत्य परमेश्वरास दुष्ट वाटल्यावरून त्यालाहि
त्यानें मारून टाकिलें. ११ यहूदा आपली सून तामार
हिला म्हणाला, माझा पुत्र शेला वयांत येईपर्यंत
आपल्या बापाच्या घरीं वैधव्यदशेंत राहा; त्याला
वाटलें कीं शेलाहि आपल्या भावांप्रमाणें मरावयाचा.
मग तामार आपल्या बापाच्या घरीं जाऊन राहिली.
१२ बराच काळ लोटल्यावर यहूदाची बायको जी
शूवाची कन्या ती मरण पावली; तिच्यासाठीं शोक
करण्याचें संपल्यावर यहूदा आपला मित्र अदुल्लामकर
हीरा याजबरोबर तिम्ना येथें आपल्या मेंढरांची लोकर
कातरणाऱ्यांकडे वर गेला. १३ तेव्हां तामार हिला
कोणीं सांगितलें कीं तुझा सासरा आपल्या मेंढरांची
लोकर कातरण्यासाठीं तिम्ना येथें जात आहे.
१४ तेव्हां तिनें आपलीं वैधव्यवस्त्रें उतरलीं व बुरखा
लेऊन आपलें शरीर लपेटून घेतलें आणि तिम्नाच्या
सडकेवरील एनाईम गांवाच्या वेशीपाशीं ती जाऊन
बसली; शेला प्रौढ झाला असूनहि अजून आपणाला
त्याची बायको केलें नाहीं असें तिला दिसून आलें
होतें. १५ यहूदानें तिला पाहिलें तों त्याला वाटलें,
ही कोणी वेश्या असावी, कारण तिनें आपलें
तोंड झाकलें होतें. १६ तेव्हां ही आपली
सून आहे हें न कळून तो वाटेवरून
तिजकडे वळून म्हणाला, चल, मला तुजपाशीं येऊं
दे. तेव्हां ती म्हणाली, माझ्यापाशीं आलास तर
मला काय देशील? १७ तो म्हणाला, मी आपल्या
कळपांतलें एक करडूं तुला पाठवून देईन; ती
म्हणाली, तें पाठवीपर्यंत काय हडप ठेवशील?
१८ तो म्हणाला, तुला काय हडप देऊं? ती म्हणाली,
तुझी मुद्रिका, गोफ व हातांतील काठी दे. हीं तिला
देऊन तो तिच्यापाशीं गेला तेव्हां तिला त्याजपासून
गर्भ राहिला. १९ तेथून ती निघून गेली आणि
आपला बुरखा काढून आपलीं वैधव्यवस्त्रें पुन्हां
ल्याली. २० मग त्या स्त्रीपासून आपलें हडप आणण्या-
साठीं आपला मित्र अदुल्लामकर याच्या हातीं
यहूदानें एक करडूं पाठविलें, पण त्याला ती कोठें
सांपडली नाहीं. २१ मग त्यानें तेथल्या लोकांस
विचारिलें, एनाईम गांवापाशीं वाटेवर एक वेश्या
होती ती कुठें आहे? ते म्हणाले, येथें कोणी वेश्या
नव्हती. २२ मग तो यहूदाकडे परत जाऊन
म्हणाला, मला कांहीं ती सांपडली नाहीं; तेथचे
लोकहि म्हणाले कीं येथें कोणी वेश्या नव्हती.
२३ तेव्हां यहूदा म्हणाला, तें हडप तिजपाशींच राहूं
दे, नाहींतर तेथचे लोक आपली छीथू करितील; मीं
तर करडूं पाठविलें, पण तुला ती सांपडली नाहीं.
२४ या गोष्टीस सुमारें तीन महिने झाले तेव्हां कोणीं
यहूदास सांगितलें कीं तुझी सून तामार हिनें वेश्या-

कर्म केलें व त्या शिंदळकीमुळें तिला गर्भहि राहिला
आहे. तेव्हां यहूदा म्हणाला, तिला बाहेर काढून
जाळून टाका. २५ तिला बाहेर काढिलें तेव्हां तिनें
आपल्या सासऱ्यास निरोप पाठविला कीं या वस्तु
ज्या पुरुषाच्या आहेत त्याजपासून मला गर्भ राहिला
आहे; आणखी ती म्हणाली, नीट डोळे उघडून पाहा;
ही मुद्रिका, हा गोफ व ही काठी कुणाची आहे तीं.
२६ यहूदानें त्या ओळखून म्हटलें, माझ्यापेक्षां ती
अधिक क्षमापात्र आहे; कारण मीं आपला पुत्र शेला
तिला नवरा करून दिला नाहीं; यापुढें त्यानें कधीं
तिजशीं संबंध केला नाहीं. २७ तिच्या प्रसूतिसमयीं
तिच्या पोटांत जुळीं आहेत असें दिसून आलें.
२८ तिला वेणा होत असतां, एका बाळकाचा हात
बाहेर आला तेव्हां सुइणीनें त्याच्या हाताला लाल
सूत बांधून म्हटलें, पहिला हा बाहेर पडला.
२९ त्यानें आपला हात आखडून घेतला तेव्हां त्याचा
भाऊ बाहेर पडला; तेव्हां सुईण म्हणाली, तूं आपल्या-
साठीं कशी वाट फोडिलीस? म्हणून त्याचें नांव
पेरेस असें पडलें. ३० मग ज्याच्या हातास लाल
सूत बांधिलें होतें तो त्याचा भाऊ बाहेर पडला
आणि त्याचें नांव जेरह ठेविलें.

## ३९

१ इकडे योसेफास मिसरांत नेलें तेव्हां ज्या
इश्माएली लोकांनीं त्यास तेथें नेलें होतें त्यांज-
पासून त्यास पोटीफर नांवाच्या एका मिसऱ्यानें
विकत घेतलें; तो फारोचा एक अंमलदार असून गारद्यांचा
सरदार होता. २ परमेश्वर योसेफाबरोबर असल्या-
कारणानें तो भाग्यवान पुरुष झाला; तो आपल्या
मिसरी धन्याच्या घरीं असे. ३ परमेश्वर त्याजबरोबर
असल्याकारणानें जें कांहीं तो हातीं घेतो त्यास परमे-
श्वर यश देतो असें त्याच्या धन्यानें पाहिलें. ४ योसेफा-
वर तो प्रसन्न झाला; योसेफ त्याचा हुजऱ्या झाला;
पुढें त्यानें त्याला आपल्या घरचा कारभारी नेमून
आपलें सर्व कांहीं त्याच्या ताब्यांत दिलें. ५ आणि
त्यानें त्याच्या स्वाधीन आपलें घरदार व सर्व कांहीं
केलें, तेव्हांपासून योसेफाप्रीत्यर्थ परमेश्वरानें त्या मिस-
ऱ्याच्या घरादाराचें कल्याण केलें; आणि त्याचें घरदार,
शेतभात या सर्वांस परमेश्वरानें बरकत दिली. ६ त्यानें
आपलें सर्व कांहीं योसेफाच्या हवालीं केलें होतें, म्हणून
तो अन्न खाई त्यापलीकडे आपलें काय आहे याचें
त्याला भान नसे. योसेफ हा बांधेसूद व देखणा होता.
७ यानंतर असें झालें कीं योसेफाच्या धन्याची स्त्री
त्याजवर नजर ठेवून त्यास म्हणाली, मजपाशीं नीज. ८
पण तो राजी झाला नाहीं. तो आपल्या धन्याच्या स्त्रीस
म्हणाला, हें पाहा, घरांत माझ्या ताब्यांत काय आहे
याचें माझ्या धन्यास भानसुद्धां नाहीं; आपलें सर्व कांहीं
त्यानें माझ्या हातीं दिलें आहे. ९ या घरांत मजहून तो
मोठा नाहीं आणि तूं त्याची पत्नी आहेस म्हणून
तुझ्याखेरीज माझ्या अखत्याराबाहेरचें असें कांहींच
नाहीं, असें असतां एवढें घोर कर्म करून मी देवाचा
अपराधी कसा होऊं? १० तरी ती हररोज योसेफाचें
मन वश करावयास पाहूं लागली, पण तिजपाशीं
निजावयास किंवा तिजपाशीं जावयास तो कांहीं राजी
होईना. ११ एके दिवशीं असें झालें कीं तो आपलें
कांहीं कामकाज करावयास घरांत गेला, त्या वेळीं
घरांतलें कोणीहि मनुष्य तेथें नव्हतें. १२ तेव्हां तिनें
त्याचें वस्त्र धरून म्हटलें, मजपाशीं नीज; पण तो
आपलें वस्त्र तिच्या हातीं सोडून बाहेर पळून गेला.
१३ तो वस्त्र आपल्या हातीं सोडून पळून गेला असें तिनें
पाहिलें, १४ तेव्हां तिनें घरच्या माणसांस बोलावून
सांगितलें, पाहा, आमची अब्रू घेण्यासाठीं त्यांनीं
हा इब्री मनुष्य घरांत आणिला आहे; तो मजपाशीं
निजण्याच्या हेतूनें माझ्याजवळ आला तेव्हां मी
मोठ्यानें ओरडलें. १५ मी मोठ्यानें ओरडलें हें पाहून
तो आपलें वस्त्र मजजवळ टाकून पळून गेला.
१६ त्याचा धनी घरीं येईपर्यंत तिनें तें वस्त्र आपल्या-
जवळ राखून ठेविलें. १७ तो आल्यावर तिनें त्याला
असें सांगितलें कीं जो इब्री दास आपण आपल्या घरीं
ठेविला आहे तो माझी अब्रू घेण्यास मजकडे
आला होता. १८ मी मोठ्यानें ओरडलें तेव्हां तो
आपलें वस्त्र माझ्याजवळ टाकून पळून गेला.

१९ आपल्या गुलामानें मजशीं असें वर्तन केलें, हें आपल्या बायकोचें बोलणें जेव्हां त्याच्या धन्यानें ऐकलें तेव्हां त्याचा राग भडकला. २० योसेफास त्याच्या धन्यानें धरिलें, आणि सजाचे बंदिवान होते त्या बंदिशाळेंत त्यास टाकिलें; तो त्या बंदिशाळेंत राहिला. २१ तथापि परमेश्वर योसेफाबरोबर असून त्यानें त्याजवर दया केली, आणि त्या बंदिशाळेच्या अधिकाऱ्याची त्याजवर कृपादृष्टि होईल असें केलें. २२ बंदिशाळेच्या अधिकाऱ्यानें त्या बंदिखान्यांत असलेले सर्व बंदिवान योसेफाच्या स्वाधीन केले; आणि तेथें जें कांहीं त्यांस करावयाचें असे तें करविणारा तो असे. २३ बंदिशाळेच्या अधिकाऱ्याच्या स्वाधीन जें कांहीं होतें त्याकडे त्याला स्वतांला पाहावें लागत नसे, कारण परमेश्वर योसेफाबरोबर असल्यामुळें जें कांहीं तो हातीं घेई तें परमेश्वर सिद्धीस नेई.

४० १ यानंतर असें झालें कीं मिसराच्या राजाचा प्यालेबरदार व आचारी या दोघांनीं आपल्या स्वामीचा कांहीं अपराध केला. २ प्यालेबरदारांचा नायक व आचाऱ्यांचा नायक ह्या त्याच्या दोघां सरदारांवर फारोची इतराजी झाली. ३ तेव्हां त्यानें त्यांस गारद्यांच्या नायकाच्या वाड्यांत कैदेंत ठेविलें; तेथेंच योसेफहि अटकेंत होता. ४ गारद्यांच्या नायकानें योसेफास त्यांच्या तैनातीस दिलें; व त्यानें त्यांची बरदास्त ठेविली; तेथें ते कांहीं काळ अटकेंत राहिले. ५ बंदींत पडलेले मिसरी राजाचे प्यालेबरदार व आचारी या उभयतांस एकाच रात्रीं त्यांला लागू पडेल अशा अर्थाचीं स्वप्नें पडलीं. ६ सकाळीं योसेफ त्यांच्याकडे जाऊन पाहतो तों त्यांची मुद्रा खिन्न दिसली. ७ तेव्हां आपल्या धन्याच्या कारागृहांत आपल्याबरोबर असलेल्या त्या फारोच्या सरदारांस त्यानें विचारिलें, आज तुमचीं तोंडें कां उतरलेलीं दिसतात? ८ ते त्यास म्हणाले, आम्हां दोघांना स्वप्नें पडलीं आहेत, व त्यांचा अर्थ सांगणारा कोणी नाहीं. योसेफ त्यांस म्हणाला, अर्थ सांगणें देवाकडे आहे ना? आपआपलें स्वप्न मला सांगा.

९ प्यालेबरदारांच्या नायकानें योसेफाला आपलें स्वप्न सांगितलें तें असें: स्वप्नांत माझ्यासमोर एक द्राक्षवेल होता; १० त्या द्राक्षवेलास तीन फाटे होते, त्याला कळ्या फुटून बहर आला व त्याच्या गुच्छांस द्राक्षें येऊन पिकलीं; ११ आणि फारोचा प्याला माझ्या हातांत होता; मीं त्या प्याल्यांत द्राक्षें पिळिलीं व तो फारोच्या हातीं दिला. १२ योसेफ त्यास म्हणाला, याचा अर्थ असा: ते तीन फाटे म्हणजे तीन दिवस; १३ तीन दिवसांच्या आंत फारो तुझें शीर वर करून तुला तुझ्या हुद्द्यावर पूर्ववत् नेमील आणि तूं पूर्वींप्रमाणें फारोचा प्यालेबरदार होऊन त्याच्या हातीं प्याला देशील. १४ मात्र तुझें बरें झालें म्हणजे माझें स्मरण अवश्य ठेव, आणि मजवर कृपा करून फारोपाशीं माझी गोष्ट काढून या घरांतून माझी सुटका कर. १५ कारण इब्र्यांच्या देशाहून मला चोरून आणिलें असून, येथें या बंदिखान्यांत टाकण्याजोगें मीं कांहींएक केलें नाहीं.

१६ स्वप्नाचा अर्थ चांगला आहे हें पाहून आचाऱ्यांचा नायक योसेफास म्हणाला, मलाहि असें स्वप्न पडलें कीं पांढऱ्या रोट्यांच्या तीन टोपल्या माझ्या डोकीवर होत्या, १७ आणि वरच्या टोपलींत फारोसाठीं सर्व प्रकारचीं पक्वान्नें असून पक्षी माझ्या डोकीवरल्या त्या टोपलींतले पदार्थ खात होते. १८ योसेफ म्हणाला, याचा अर्थ असा: त्या तीन टोपल्या म्हणजे तीन दिवस; १९ फारो तीन दिवसांच्या आंत तुझें शीर वर करून उडवील, तुला झाडावर टांगील आणि पक्षी तुझें मांस तोडून खातील.

२० तिसरे दिवशीं फारोचा वाढदिवस आला, तेव्हां त्यानें आपल्या सर्व चाकरांस जेवण दिलें, आणि त्यानें आपला प्यालेबरदारांचा नायक व आचाऱ्यांचा नायक यांचीं शिरें त्या चाकरांपुढें वर केलीं. २१ त्यानें प्यालेबरदारांच्या नायकास त्याच्या हुद्द्यावर पूर्ववत् नेमिलें, आणि तो फारोच्या हातीं प्याला देण्याचें काम करूं लागला; २२ पण त्यानें आचाऱ्यांच्या नायकास फासावर चढविलें. योसेफानें त्यांच्या स्वप्नांचा अर्थ सांगितल्याप्रमाणें घडलें. २३ तथापि प्यालेबरदारांच्या नायकानें योसेफाचें स्मरण ठेविलें नाहीं; तो त्याला विसरला.

**४१** १ पुढें दोन वर्षें लोटल्यावर फारोस स्वप्न
पडलें कीं आपण नील नदीच्या तीरीं उभे
असतांना २ सात सुंदर व धष्टपुष्ट गाई
नदींतून बाहेर निघून लव्हाळ्यांत चरूं लागल्या.
३ पुढें पाहतो तों त्यांच्यामागून कुरूप व दुबळ्या अशा
आणखी सात गाई नदींतून निघाल्या आणि त्या
पहिल्या गाईंजवळ नदीतीरीं उभ्या राहिल्या. ४ तेव्हां
कुरूप व दुबळ्या गाईंनीं त्या सुंदर व धष्टपुष्ट गाईंस
खाऊन टाकिलें. तदनंतर फारो जागा झाला. ५ मग
तो पुनः झोपीं गेला असतां त्याला दुसऱ्यांदा स्वप्न
पडलें कीं एकाच ताटाला सात चांगलीं भरदार
कणसें आलीं; ६ आणि पाहा, त्यांमागून लुंगींसुंगीं
व पूर्ववायूनें करपलेलीं अशीं सात कणसें निघालीं.
७ त्या लुंग्यासुंग्या कणसांनीं तीं सात चांगलीं भरदार
कणसें खाऊन टाकिलीं. मग फारो जागा झाला आणि
हें स्वप्न आहे असें त्यानें पाहिलें. ८ सकाळीं फारोचें
चित्त व्यग्र झालें, आणि त्यानें मिसर देशांतील अवघे
ज्योतिषी व पंडित ह्यांना बोलाविलें; फारोनें आपलीं
स्वप्नें त्यांस सांगितलीं पण त्यांचा अर्थ कोणाला
सांगतां येईना.

९ तेव्हां प्यालेबरदारांचा नायक फारोस म्हणाला,
माझ्या अपराधांची आज मला आठवण होत आहे. १०
फारोची आपल्या सेवकांवर इतराजी झाली तेव्हां त्यानें
मला व आचाऱ्यांच्या नायकाला गारद्यांच्या नायकाच्या
घरीं बंदींत टाकिलें होतें. ११ तेव्हां एकाच रात्रीं आम्हां
दोघांस, आम्हां प्रत्येकास लागू पडेल अशा अर्थाचीं स्वप्नें
पडलीं; १२ तेथें त्या गारद्यांच्या नायकाचा दास कोणी
इब्री तरुण पुरुष आम्हांबरोबर होता, त्याला आम्हीं आपलीं
स्वप्नें सांगितलीं व त्यानें त्यांचा अर्थ सांगितला; त्यानें
प्रत्येकाच्या स्वप्नानुसार अर्थ सांगितला. १३ त्यानें
आम्हांस अर्थ सांगितला तसेंच घडून आलें; मला
आपल्या हुद्द्यावर पूर्ववत् रुजू केलें आणि त्यास
फाशीं दिलें.

१४ मग फारोनें योसेफास बोलावणें पाठविलें, तेव्हां
त्याला तत्क्षणीं बंदिखान्यांतून बाहेर आणिलें; आणि तो
आपलें मुंडण करून व वस्त्रें बदलून फारोपुढें जाऊन उभा
राहिला. १५ फारो योसेफास म्हणाला, मीं एक स्वप्न
पाहिलें, त्याचा अर्थ कोणास सांगतां येत नाहीं; मीं तुजविषयीं
ऐकलें कीं तूं स्वप्न ऐकतांच त्याचा अर्थ सांगतोस. १६
योसेफ फारोस म्हणाला, मी कोण सांगणारा ? फारोला
मंगलदायक उत्तर देवच देईल. १७ नंतर फारोनें योसे-
फास सांगितलें, मी स्वप्नांत नीलतीरीं उभा होतों;
१८ तेव्हां पाहा, सात सुंदर व पुष्ट गाई नदींतून बाहेर
निघून लव्हाळ्यांत चरूं लागल्या; १९ आणि त्यांच्या-
मागून दुबळ्या, कुरूप व रोड अशा दुसऱ्या सात
गाई निघाल्या; त्यांच्यासारख्या बेढब गाई साऱ्या
मिसर देशांत मीं कधीं पाहिल्या नाहींत; २० त्या
दुबळ्या व कुरूप गाईंनीं त्या पहिल्या सात पुष्ट गाईंना
खाऊन टाकिलें. २१ त्यांनीं त्यांना खाऊन टाकिलें
तेव्हां त्या त्यांच्या पोटांत गेल्या असें मुळींच दिसेना;
पूर्वीप्रमाणेंच त्या कुरूप राहिल्या. मग मी जागा
झालों. २२ पुनः मीं स्वप्नांत पाहिलें कीं चांगलीं
भरदार सात कणसें एकाच ताटाला आलीं, २३
आणि त्यांच्यामागून सुकलेलीं, लुंगींसुंगीं व पूर्व-
वायूनें करपलेलीं अशीं सात कणसें निघालीं; २४
आणि त्या सात लुंग्यासुंग्या कणसांनीं तीं सात
चांगलीं कणसें खाऊन टाकिलीं. मीं हें ज्योतिष्यांस
सांगितलें, पण त्यांतल्या कोणासहि तें मला उलगडून
सांगतां येईना.

२५ योसेफ फारोस म्हणाला, फारोला पडलेलें स्वप्न
एकच आहे; आपण काय करणार हें देवानें फारोस
कळविलें आहे. २६ त्या सात सुंदर गाई सात वर्षें
होत, आणि सात चांगलीं कणसें हीं सात वर्षें होत;
स्वप्न एकच आहे. २७ मागाहून वर आलेल्या सात
रोड व कुरूप गाई आणि सुकलेलीं व पूर्ववायूनें
करपलेलीं सात कणसें हीं दुष्काळाचीं सात वर्षें होत.
२८ मीं फारोस कळविलेंच आहे कीं आपण काय
करणार हें देवानें फारोस दर्शविलें आहे. २९ पाहा,
अवघ्या मिसर देशांत सुबत्तेचीं सात वर्षें येत आहेत;
३० आणि त्यानंतर दुष्काळाचीं सात वर्षें येतील;

तेव्हां मिसर देशाला सुबत्तेचा विसर पडेल, आणि
दुष्काळ देशाची हलाखी करील. ३१ पुढें जो दुष्काळ
पडणार त्यामुळें पूर्वी सुकाळ होता कीं नव्हता याचें
स्मरणहि राहणार नाहीं, एवढा भारी तो होणार.
३२ हें स्वप्न फारोस दोनदां पडलें याचें कारण हेंच
कीं असें देवानें मुक्रर केलें आहे व तें देव लवकरच
सिद्धीस नेणार. ३३ तर आतां फारोनें कोणी एकादा
चतुर व शहाणा पुरुष पाहून त्यास मिसर देशावर
नेमावें: ३४ आणि फारोनें हें करून देशावर अधिकारी
नेमावे आणि सुबत्तेच्या सात वर्षांत मिसर देशांतील
उत्पन्नाचा पंचमांश घ्यावा. ३५ या येणाऱ्या सुबत्तेच्या
वर्षांत सर्व प्रकारची अन्नसामग्री गोळा करावी
आणि नगरोनगरीं अन्नाच्या पुरवठ्यासाठीं धान्याचा
सांठा, फारोच्या ताब्यांत ठेवावा. ३६ मिसर देशा-
वर दुष्काळाचीं जीं सात वर्षें येणार त्यांसाठीं ही
अन्नाची बेगमी होईल. म्हणजे दुष्काळानें देशाचा
नाश होणार नाहीं.

३७ हें फारोला व त्याच्या सर्व सेवकांला अगदीं पटलें.
३८ तेव्हां फारो आपल्या सेवकांस म्हणाला, ज्याच्या
ठायीं देवाचा आत्मा आहे असा या पुरुषासारखा
आपणांला दुसरा कोणी आढळेल काय ? ३९ आणि
फारो योसेफास म्हणाला, देवानें तुला या सर्व गोष्टींचें
ज्ञान दिलें आहे त्या अर्थी तुजसारखा चतुर व शहाणा
दुसरा कोणी नाहीं. ४० तर तूं माझ्या घराचा
अधिकारी हो: तुझ्या आज्ञेप्रमाणें माझी सर्व प्रजा
चालेल, गादीपुरताच काय तो मी तुजपेक्षां मोठा.
४१ फारो योसेफास आणखी म्हणाला, पाहा, तुला मी
अवघ्या मिसर देशावर नेमितों. ४२ मग फारोनें
आपल्या बोटांतील मुद्रिका काढून योसेफाच्या बोटांत
घातली, त्याला सणाचीं शुभ्र वस्त्रें लेवविलीं आणि
त्याच्या गळ्यांत सोन्याची कंठी घातली: ४३ मग
त्याला आपल्या मागच्या रथांत बसविलें, आणि
मुजरा करा असें चोपदार त्याच्यापुढें ललकारत
चालले. या प्रकारें त्यानें त्याला अवघ्या मिसर देशावर
नेमिलें. ४४ फारो योसेफास म्हणाला, मी फारो खरा,
पण तुझ्या हुकमाशिवाय अवघ्या मिसर देशांत कोणी
हात किंवा पाय हालविणार नाहीं. ४५ फारोनें
योसेफाचें नांव साफनाथ-पानेह असें ठेविलें: आणि
ओन येथील याजक पोटीफरा याची कन्या आसनथ ही
त्याला बायको करून दिली. मग योसेफ मिसर देशांत
दौरा करूं लागला.

४६ मिसरी राजा फारो याजपुढें योसेफ जाऊन
उभा राहिला तेव्हां तो तीस वर्षांचा होता. मग
योसेफ फारोजवळून निघून सर्व देशांत दौरा करूं
लागला. ४७ त्या सुकाळाच्या सात वर्षांत जमिनीस
भरमुठी पीक आलें. ४८ त्यानें या सात वर्षांत
मिसर देशांतील सर्व अन्नसामग्री गोळा करून नगरो-
नगरीं सांठवून ठेविली; एकेका नगराच्या आसपासचें
पीक त्यानें त्या त्या नगरांतच सांठवून ठेविलें.
४९ योसेफानें समुद्राच्या वाळूसारखा धान्याचा
महापूर संचय करून ठेविला; त्यानें तें गणावयाचें
सोडिलें, कारण तें अगणित होतें. ५० दुष्काळ
पडण्यापूर्वी ओन येथील याजक पोटीफरा याची कन्या
आसनथ हिचे पोटीं योसेफास दोन पुत्र झाले. ५१
योसेफानें आपल्या ज्येष्ठ पुत्राचें नांव मनश्शे ठेविलें; तो
म्हणाला, देवानें माझ्या सर्व क्लेशांचा व माझ्या पितृ-
गृहाचा मला विसर पाडिला आहे. ५२ त्यानें
दुसऱ्याचें नांव एफ्राईम ठेविलें; तो म्हणाला, माझ्या
विपत्तीच्या देशांत देवानें मला फलद्रूप केलें आहे.
५३ मिसर देशांतल्या सुकाळाचीं सात वर्षें संपलीं.
५४ मग योसेफानें सांगितल्याप्रमाणें दुष्काळाचीं सात
वर्षें सुरू झालीं, तेव्हां सर्व देशांत दुष्काळ पडला.
तथापि मिसर देशांत सर्वत्र अन्न होतें. ५५ अवघ्या
मिसर देशाची उपासमार होऊन लोक फारोपाशीं
अन्नअन्न करूं लागले, तेव्हां फारो सर्व मिसरी
लोकांस म्हणाला, योसेफाकडे जा: तो तुम्हांस सांगेल
तें करा. ५६ दुष्काळानें भूतल व्यापिलें, आणि
मिसरांत तो भारी कडक झाला, तेव्हां योसेफ सर्व
कोठारें उघडून मिसरी लोकांस धान्य विकूं लागला.
५७ तेव्हां देशोदेशाचे लोक धान्य विकत घेण्यासाठीं

मिसरांत योसेफाकडे गेले, कारण साऱ्या पृथ्वीभर
भारी कडक दुष्काळ पडला होता.

## ४२

१ याकोबानें ऐकलें कीं मिसर देशांत
धान्य आहे; तेव्हां तो आपल्या पुत्रांस
म्हणाला, तुम्ही एकमेकांच्या तोंडाकडे कां
पाहत राहिलां आहां ? २ तो म्हणाला, पाहा, मिसरांत
धान्य आहे असें मी ऐकतों; तुम्ही तेथें जाऊन
आपणांसाठीं धान्य विकत आणा, म्हणजे आपण जगूं,
मरणार नाहीं. ३ मग योसेफाचे दहा भाऊ धान्य खरेदी
करण्यासाठीं मिसर देशास गेले. ४ तथापि योसेफाचा
भाऊ बन्यामीन यास याकोबानें त्याच्या भावांबरोबर
पाठविलें नाहीं; न जाणों त्याला एखादा अपाय व्हाव-
याचा असें त्याला वाटलें. ५ याप्रमाणें इस्राएलाचे पुत्र
इतर लोकांबरोबर धान्य खरेदी करण्यास आले; कारण
कनान देशांत दुष्काळ पडला होता. ६ योसेफ त्या
देशाचा अधिकारी होता, आणि देशांतल्या सर्व
लोकांस तोच धान्य विकीत असे. योसेफाच्या भावांनीं
येऊन जमिनीपर्यंत लवून त्यास मुजरा केला.
७ योसेफानें आपल्या भावांस पाहतांच ओळखिलें,
तथापि त्यांशी अनोळख्यासारखें वागून त्यानें कठोरपणानें
त्यांस विचारिलें कीं तुम्ही कोठून आलां ? त्यांनीं
म्हटलें, कनान देशांतून धान्य खरेदी करण्यास आम्ही
आलों आहों. ८ योसेफानें आपल्या भावांस
ओळखिलें, पण त्यांनीं त्याला ओळखिलें नाहीं. ९ मग
त्यांच्याविषयीं जीं स्वप्नें पडलीं होतीं त्यांचें योसेफास
स्मरण होऊन तो त्यांस म्हणाला, तुम्ही हेर आहां.
देशाचीं मर्मस्थानें पाहण्यासाठीं तुम्ही आलां आहां.
१० ते म्हणाले, स्वामी, नाहीं, नाहीं; आपले दास अन्न-
सामग्री खरेदी करण्यास आले आहेत. ११ आम्ही
सर्व एकाच पुरुषाचे पुत्र असून साळसूद मनुष्यें आहों,
आपले दास हेर नव्हत. १२ तो त्यांस म्हणाला,
नाहीं, नाहीं; तुम्ही देशाचीं मर्मस्थानें पाहण्यास आलां
आहां. १३ ते म्हणाले, आम्ही आपले दास बारा भाऊ
असून, कनान देशांतल्या एका पुरुषाचे पुत्र आहों;
सर्वांत धाकटा आजमितीस बापापाशीं आहे व एक
नाहींसा झाला. १४ मग योसेफ त्यांस म्हणाला, तर
मग मीं तुम्हांस म्हटलें तेंच खरें आहे, तुम्ही हेरच
आहां. १५ आतां तुमची कसोटी पाहतों; फारोच्या
जीविताची शपथ, तुमचा धाकटा भाऊ येथें आल्या-
शिवाय तुमची येथून सुटका व्हावयाची नाहीं.
१६ आपल्यापैकीं एकास त्या भावाला आणावयास
पाठवा; तुम्ही येथें अटकेंत राहा; म्हणजे तुम्ही म्हणतां
त्याप्रमाणें तुम्ही साळसूद आहां किंवा नाहीं याची
परीक्षा होईल, नाहीं तर फारोच्या जीविताची शपथ,
तुम्ही हेर ठराल. १७ मग त्यानें त्यांस तीन दिवस
अटकेंत ठेविलें.

१८ योसेफ त्यांस तिसऱ्या दिवशीं म्हणाला,
मी देवाचें भय बाळगणारा आहें, यास्तव एवढें
करा म्हणजे तुमचा जीव वांचेल; १९ तुम्ही
साळसूद पुरुष असलां तर तुम्हां भावांतल्या एकास
या बंदिगृहांत राहूं द्या आणि तुमच्या घरच्यांची
उपासमार निवारण्यासाठीं तुम्ही धान्य घेऊन जा;
२० आणि आपल्या धाकट्या भावास मजकडे घेऊन
या, म्हणजे तुमचें म्हणणें खरें ठरेल व तुमचें मरण
टळेल. त्यांनीं तसें केलें. २१ मग ते एकमेकांस
म्हणाले, आपण आपल्या भावाच्या बाबतींत केलेला
अपराध आपणांस भोवत आहे; त्यानें आपली काकळूत
केली असून व आपण त्याचें दुःख पाहिलें असून
त्याचें ऐकलें नाहीं म्हणून हें संकट आपणांवर ओढवलें
आहे. २२ रऊबेन त्यांस म्हणाला, मुलास कांहीं
अपाय करूं नका असें मी तुम्हांला सांगितलें नव्हतें
काय ? पण तुम्ही माझें ऐकलें नाहीं; पाहा, आतां
त्याच्या रक्ताचा बदला द्यावा लागत आहे. २३ योसेफाचें
व त्यांचें भाषण दुभाष्याच्या द्वारें चाललें होतें
म्हणून आपण बोललों तें तो समजला असेल असें त्यांस
वाटलें नाहीं. २४ तो त्यांस सोडून एका बाजूस
जाऊन रडला; मग परत येऊन तो त्यांच्याशीं बोलूं
लागला; त्यानें त्यांच्यांतून शिमोनास काढून त्यांच्या-
देखत बांधिलें. २५ मग योसेफानें आज्ञा दिली कीं, त्यांच्या
गोण्यांत धान्य भरा; प्रत्येकाचा पैका ज्याच्या त्याच्या

गोणींत टाका, वाटेसाठीं शिधा द्या; आणि
त्याप्रमाणें त्यांची व्यवस्था लाविली.
२६ ते गाढवांवर धान्य लादून मार्गस्थ झाले. २७
त्यांतल्या एकानें वाटेंत उतारशाळेंत आपल्या गाढवाला
वैरण देण्यासाठीं आपली गोणी उघडिली, तेव्हां आपला
पैका गोणीच्या तोंडाशीं असलेला त्यानें पाहिला; २८ आणि
तो आपल्या भावांस म्हणाला, माझा पैका परत दिला आहे;
पाहा, हा माझ्या गोणींत आहे. तेव्हां त्यांच्या काळजानें
ठाव सोडिला. ते थरथर कांपत एकमेकांकडे वळून म्हणाले,
देवानें आपणांस हें काय केलें? २९ मग ते कनान
देशीं आपला बाप याकोब याजपाशीं जाऊन पोहंचले
आणि आपला सर्व वृत्तांत त्यांनीं त्यास सांगितला
तो असा: ३० त्या देशाचा अधिपति आम्हांशीं
फार कठोरपणानें बोलला व त्यानें आम्हांस देश
हेरणारे ठरविलें. ३१ आम्ही त्यास म्हणालों, आम्ही
साळसूद मनुष्यें आहों, आम्ही हेर नाहीं, ३२ आम्ही
बारा बंधु एका बापाचे पुत्र आहों, एक नाहींसा
झाला आणि सर्वांत धाकटा कनान देशांत आमच्या
पित्यापाशीं आहे. ३३ यावर तो देशाधिपति आम्हांस
म्हणाला, तुम्ही साळसूद मनुष्यें आहां अशी माझी खात्री
होण्यास एवढें करा कीं तुम्हां भावांतल्या एकास
मजपाशीं राहूं द्या, आणि आपल्या घरच्यांची उपासमार
निवारण्यासाठीं तुम्ही धान्य घेऊन परत जा. ३४
तुम्ही आपल्या धाकट्या भावास घेऊन या म्हणजे
मला खात्री पटेल कीं तुम्ही हेर नाहीं, तर साळसूद मनुष्यें
आहां; मग तुमचा भाऊ मी तुम्हांस परत देईन आणि
तुम्हांस या देशांत देवघेव करितां येईल.

३५ ते आपल्या गोण्या रिकाम्या करीत
असतां प्रत्येकाची रुपयांची थैली ज्याच्यात्याच्या
गोणींत आढळली; त्यांनीं व त्यांच्या बापानें त्या
रुपयांच्या थैल्या पाहिल्या तेव्हां ते फार घाबरले.
३६ त्यांचा बाप याकोब त्यांस म्हणाला, तुम्ही मला
अपत्यहीन केलें आहे; योसेफ नाहींसा झाला, शिमोन
नाहीं, आणि तुम्ही बन्यामिनालाहि घेऊन जाऊं पाहतां;
मजवर हीं सर्व अरिष्टें आलीं आहेत. ३७ मग
रऊबेन आपल्या बापास म्हणाला, मी जर त्यास
तुमच्याकडे घेऊन न आलों तर माझे दोन पुत्र मारून
टाका; त्याला माझ्या हवालीं करा, मी त्यास परत
आपल्याकडे आणीन. ३८ तो म्हणाला, माझ्या मुलास मी
तुम्हांबरोबर पाठविणार नाहीं, कारण त्याचा भाऊ मेला
आहे आणि तो एकटाच राहिला आहे; ज्या मार्गानें
तुम्ही जात आहां त्यांत त्याच्यावर कांहीं अरिष्ट आलें तर
तुम्ही मला शोकमग्न करून हे माझे पिकलेले केस
लवकरच अधोलोकीं उतरावयास कारण व्हाल.

४३ १ देशांत दुष्काळ फार कडक झाला.
२ त्यांनीं मिसराहून आणिलेलें धान्य खाऊन
संपविलें तेव्हां त्यांचा बाप त्यांस म्हणाला,
पुनः जाऊन आपल्यासाठीं थोडी अन्नसामग्री खरेदी
करा. ३ तेव्हां यहूदा त्यास म्हणाला, त्या मनुष्यानें
आम्हांस अगदीं निक्षून सांगितलें आहे कीं तुमच्या
भावास तुम्हीं आपल्याबरोबर आणिलें नाहीं तर माझें
तोंड तुमच्या दृष्टीस पडावयाचें नाहीं. ४ तुम्ही आमच्या
भावास आम्हांबरोबर पाठवाल तर आम्ही जाऊन
तुम्हांसाठीं अन्नसामग्री विकत आणूं, ५ पण जर तुम्ही
त्याला पाठविणार नसलां, तर आम्ही जाणार नाहीं;
कारण त्या मनुष्यानें आम्हांस सांगितलें आहे कीं
तुमचा भाऊ तुम्हीं बरोबर आणिला नाहीं तर माझें
तोंड तुमच्या नजरेस पडणार नाहीं. ६ मग इस्रा-
एल म्हणाला, आणखी एक भाऊ आहे हें
त्या मनुष्याला सांगून माझ्यावर हें अरिष्ट कां आणिलें?
७ तेव्हां ते म्हणाले, त्यानें आम्हांविषयीं व आमच्या
घराण्याविषयीं बारकाईनें विचारिलें; तो म्हणाला,
तुमचा बाप अजून जिवंत आहे काय? तुम्हांला
आणखी एकादा भाऊ आहे काय? त्याच्या प्रश्नांचीं
उत्तरें आम्हांस द्यावीं लागलीं. तुम्ही आपल्या भावास
घेऊन या असें आम्हांस तो सांगेल हें आम्हांला
आधीं कसें कळावें? ८ यहूदा आपला बाप इस्राएल
यास म्हणाला, मुलास मजबरोबर पाठवा, म्हणजे
आम्ही उठून मार्गस्थ होऊं; अशानें आम्ही, तुम्ही आणि
आमचीं मुलेंबाळें वांचतील, मरणार नाहींत. ९ मी

त्याचा जामीन होतों, त्याचा जिम्मा मजकडे लागला;
मीं त्याला परत आणून आपल्या स्वाधीन केलें नाहीं तर
आपला मी निरंतरचा गुन्हेगार ठरेन. १० आम्हीं विलंब
केला नसता तर आतां आमची दुसरी खेप झाली असती.
११ मग त्यांचा बाप इस्राएल त्यांस म्हणाला, असेंच
असेल तर मग एवढें करा: या देशांत उत्पन्न होणारे
मोल्वान् पदार्थ त्या मनुष्यास भेट म्हणून आपल्या
गोणींत घालून न्या; थोडा डिंक, थोडा मध, मसाला
व बोळ, आणि कांहीं पिस्ते व बदाम घेऊन जा;
१२ दुप्पट पैसा बरोबर न्या; तुमच्या गोणींच्या तोंडीं जो
पैसा परत आला तोहि घेऊन जा, कदाचित् कांहीं चूक
झाली असेल. १३ तर आतां आपल्या भावास बरोबर
घेऊन त्या मनुष्याकडे जावयास निघा. १४ त्या
मनुष्यापुढें तुम्ही गेलां म्हणजे, सर्वसमर्थ देवाला तुमचा
कळवळा येवो, आणि दुसरा भाऊ व बन्यामीन यांस
तो मनुष्य परत तुमच्या हवालीं करो आणि यावर
मी आपल्या मुलांना मुकलों तर मुकलों.

१५ ती भेट, दुप्पट पैसा आणि बन्यामीन हीं
बरोबर घेऊन तीं मनुष्यें मिसर देशास निघून
गेलीं व योसेफापुढें जाऊन उभीं राहिलीं; १६ योसेफानें
त्यांच्याबरोबर बन्यामिनास पाहिलें तेव्हां तो घरच्या
कारभाऱ्यास म्हणाला, या मनुष्यांस घरांत ने, पशु
मारून भोजन तयार कर, आज दोन प्रहरीं हीं
मनुष्यें मजबरोबर जेवावयाचीं आहेत. १७ योसेफाच्या
सांगण्याप्रमाणें त्या मनुष्यानें केलें, आणि मग तो
त्यांस योसेफाच्या घरीं घेऊन गेला. १८ आपणांस
योसेफाच्या घरीं नेलें हें पाहून ते घाबरले व
म्हणाले, पूर्वीच्या खेपेस आपल्या गोणींतून पैसा परत
गेला म्हणून आपणांस आंत नेत आहेत; याचा विचार
असा दिसतो कीं कांहीं तरी निमित्त काढून आपणांवर
तुटून पडावें, आपणांस गुलाम करावें आणि आपलीं
गाढवेंहि बळकावावीं. १९ मग ते घराच्या दाराजवळ
योसेफाच्या घरचा कारभारी होता त्याजकडे जाऊन
म्हणाले, २० महाराज, पहिल्या खेपेस धान्य विकत
घेण्यास आम्ही येथें आलों होतों. २१ आम्ही
उतारशाळेंत जाऊन पोहंचलों आणि आपल्या गोणी
उघडून पाहतों तों प्रत्येकाचा पैसा होता तेवढा
प्रत्येकाच्या गोणीच्या तोंडीं सांपडला, तो आमच्या-
बरोबर आम्हीं परत आणिला आहे. २२ अन्नसामग्री
विकत घेण्यासाठीं आणली अलाहिदा पैसा आणिलेला
आहे; आमच्या गोणींत पैसा कोणीं ठेविला हें
आम्हांस ठाऊक नाहीं. २३ तो म्हणाला, तुमचें
कुशल असो, भिऊं नका; तुमच्या व तुमच्या
वडिलाच्या देवानें तुमच्या गोणींत धन घातलें
असेल; मला तुमचा पैसा पोहंचला. मग त्यानें
शिमोनास त्यांजकडे आणिलें. २४ नंतर त्यानें त्या
मनुष्यांस योसेफाच्या घरांत नेऊन पाणी दिलें आणि
त्यांनीं आपले पाय धुतले; व त्यानें त्यांच्या गाढवांस
वैरणहि दिली. २५ दुपारीं योसेफ येणार त्या वेळीं
त्याला द्यावयाच्या भेटीची तयारी त्यांनीं करून
ठेविली; आपणांस येथें भोजन करावयाचें आहे हें
त्यांस कळलें होतें.

२६ योसेफ घरीं आला तेव्हां त्यांनीं आपल्याबरोबर
भेट आणिली होती ती घरांत आणून त्याच्यापुढें ठेविली
आणि त्याला जमिनीपर्यंत लवून मुजरा केला. २७ मग
योसेफानें त्यांस क्षेमकुशल विचारिलें; त्यानें म्हटलें, तुम्हीं
आपल्या म्हाताऱ्या बापाविषयीं मागें सांगितलें होतें, तो
सुखरूप आहे ना? तो अजून जीवंत आहे ना? २८ ते
म्हणाले, आपला दास आमचा पिता सुखरूप आहे, अजून
जीवंत आहे असें म्हणून त्यांनीं त्यास लवून मुजरा केला.
२९ आपला भाऊ म्हणजे आपला सहोदर बन्यामीन
याजकडे नजर करून तो म्हणाला, तुम्हीं म्हणत होतां
तोच का हा तुमचा धाकटा भाऊ? तो त्यास म्हणाला,
माझ्या बाळा, देवाचा तुजवर प्रसाद होवो. ३० आपल्या
भावाविषयीं योसेफाचीं आंतडीं तुटूं लागलीं, व कोठें तरी
जाऊन रडावेंसें त्यास झालें म्हणून तो त्वरेनें आंतल्या
खोलींत जाऊन रडला. ३१ मग तो आपलें तोंड
धुऊन बाहेर आला आणि आपला गहिंवर आवरून
म्हणाला, जेवण वाढा. ३२ त्यांनीं त्याचें पात्र
वेगळें मांडिलें, त्याच्या भावांचीं पात्रें वेगळीं मांडिलीं

आणि त्याजबरोबर भोजन करणाऱ्या मिसऱ्यांची
वेगळीं मांडिलीं; कारण मिसरी इब्र्यांच्या पंक्तीस
बसून जेवीत नसत; मिसरी लोकांस या गोष्टीचा
तिटकारा वाटे. ३३ त्यांस पंक्तीनें योसेफा-
समोर बसविलें तेव्हां ज्येष्ठ पुत्राच्या हक्काप्रमाणें
ज्येष्ठास प्रथम बसविलें, आणि बाकीच्यांस त्यांच्या
वयाच्या मानानें बसविलें; तेव्हां ते चकित होऊन
एकमेकांकडे पाहूं लागले. ३४ मग योसेफापुढचीं
पक्वान्नें त्यांना नेऊन वाढिलीं; पण बन्यामिनास
इतरांच्या पांचपट वाढिलें; आणि ते त्याच्याबरोबर
मनमुराद प्याले.

१ मग त्यानें आपल्या घरकारभाऱ्यास
४४ आज्ञा केली कीं या मनुष्यांच्या गोणींत
जितकी अन्नसामग्री भरतां येईल तितकी
भर आणि प्रत्येकाचा पैसा ज्याच्यात्याच्या गोणीच्या
तोंडाशीं ठेव. २ आणि धाकट्याच्या गोणीच्या तोंडाशीं
धान्याच्या पैशाबरोबर माझा प्याला, माझा चांदीचा
प्याला ठेव. योसेफाच्या सांगण्याप्रमाणें त्यानें केलें.
३ सकाळीं उजाडतांच त्या माणसांची त्यांच्या गाढवांसह
रवानगी झाली. ४ ते शहर सोडून थोडें दूर गेले
नाहींत तोंच योसेफ आपल्या कारभाऱ्यास म्हणाला, चल,
त्या माणसांच्या पाठोपाठ जा आणि त्यांस गांठल्यावर
म्हण, तुम्हीं भल्याची फेड वाईटानें कां केली?
५ ज्या प्याल्यानें माझा धनी पितो व ज्यानें शकुनहि
पाहतो तोच हा प्याला नव्हे काय? तुम्हीं हें केलें तें
फार वाईट केलें. ६ तो त्यांस गांठून ह्याप्रमाणें
बोलला. ७ ते त्यास म्हणाले, स्वामींच्या तोंडून असे
शब्द कां निघाले? असली गोष्ट आपल्या दासांकडून
कधीं न घडो. ८ पाहा, जो पैसा आमच्या गोणींच्या
तोंडीं सांपडला तो देखील कनानाहून परत आणून
आपल्याला दिला, तर आपल्या स्वामींच्या घरांतलें सोनेंरुपें
आम्ही चोरणार कसें? ९ आपल्या दासांपैकीं ज्या कोणा-
पाशीं तो सांपडेल त्याला मारून टाकावें, आणि
आम्हीहि त्या आमच्या स्वामीचे गुलाम होऊं.
१० तो त्यांस म्हणाला, तुमच्या म्हणण्याप्रमाणेंच होऊं
द्या; ज्याच्यापाशीं तो प्याला सांपडेल तो माझा गुलाम
होईल व बाकीचे तुम्ही निरपराध ठराल. ११ तेव्हां
त्यांनीं त्वरा करून आपआपली गोण उतरून जमिनीवर
ठेविली आणि सोडिली. १२ त्यानें झाडा घेतला, वडिला-
पासून आरंभ करून धाकट्यापर्यंत त्यांच्या सर्व गोणी
तपासल्या तों तो प्याला बन्यामिनाच्या गोणींत सांपडला.
१३ तें पाहून त्यांनीं आपलीं वस्त्रें फाडिलीं आणि आपलीं
गाढवें लादून ते सगळे नगरांत परत आले.

१४ मग यहूदा व त्याचे भाऊ योसेफाच्या घरीं गेले;
तो अजून तेथेंच होता, आणि त्यांनीं त्याजपुढें लोटांगण
घातलें. १५ योसेफ त्यांस म्हणाला, हें कसलें कृत्य तुम्हीं
केलें? मला शकुन पाहतां येतो हें तुम्हांस ठाऊक
नाहीं काय? १६ यहूदा म्हणाला, आम्ही स्वामीं-
पुढें काय बोलणार? आम्हीं काय सांगून आमच्या-
वरचा हा आरोप दूर करावा? आपल्या दासांचा
देवानें गुन्हा पकडला आहे; तर आतां आम्ही आणि
ज्याच्यापाशीं प्याला सांपडला तो असे सर्व स्वामींचे
दास झालों आहों. १७ तो म्हणाला, माझ्या हातून
असें न घडो; ज्याच्यापाशीं हा प्याला सांपडला तोच
माझा गुलाम होईल, तुम्ही आपल्या बापाकडे
सुखरूपपणें चालते व्हा.

१८ मग यहूदा जवळ जाऊन म्हणाला, स्वामी,
मला आपल्या कानांत एक शब्द सांगण्याची आज्ञा
व्हावी; आपला राग आपल्या दासावर न भडको; आपण
तर फारोसमान आहां. १९ स्वामींनीं आपल्या दासांस
विचारिलें होतें कीं तुम्हांस बाप किंवा भाऊ आहे
काय? २० तेव्हां आम्हीं स्वामींस सांगितलें कीं
आमचा म्हातारा बाप आहे, आणि त्याला म्हातारपणीं
झालेलें एक मूल आहे; त्याचा भाऊ मरून गेला आहे,
त्याच्या आईचा तो तेवढाच राहिला आहे, आणि
त्याच्या बापाचें त्याजवर फार प्रेम आहे. २१ आपण
आपल्या दासांस म्हणालां, त्यास मजकडे घेऊन या.
म्हणजे त्याला मी आपल्या डोळ्यांनीं पाहीन.
२२ आम्हीं स्वामींस उत्तर केलें कीं त्या मुलाला
आपल्या पित्यास सोडून येतां येणार नाहीं, कारण त्यानें

आपल्या पित्यास सोडिलें तर पिता खास मरेल.
२३ आपण आपल्या दासांस म्हणाला, तुमचा धाकटा
भाऊ तुमच्याबरोबर न आला तर माझें तोंड पाहा-
वयास तुम्हांस मिळावयाचें नाहीं. २४ आपला दास
आमचा बाप याजकडे जाऊन आम्ही पोहंचलों तेव्हां
स्वामींनीं सांगितलें तें आम्हीं त्यास कळविलें. २५ पुढें
आमच्या बापानें म्हटलें, पुनः जाऊन आपल्यासाठीं
कांहीं अन्नसामग्री विकत घेऊन या. २६ तेव्हां
आम्हीं म्हटलें, आम्हांस जातांच येत नाहीं; आमचा
धाकटा भाऊ आम्हांबरोबर असेल तरच आम्ही जाऊं,
कारण तो आमच्याबरोबर नसला तर त्या मनुष्याचें
तोंड देखील आम्हांस पाहावयास मिळावयाचें नाहीं.
२७ आपला दास आमचा पिता आम्हांस म्हणाला,
तुम्हांस ठाऊक आहे कीं माझ्या स्त्रीस दोन पुत्र झाले;
२८ त्यांतल्या एकाला मी अंतरलों तेव्हां मी म्हणालों
कीं खरोखर त्याला वनपशूनें फाडून टाकिलें असावें;
आजवर तो माझ्या दृष्टीस पडला नाहीं: २९ आतां तुम्हीं
यालाहि माझ्याजवळून नेलें आणि यास कांहीं अपाय
झाला तर मला दुःख होऊन हे माझे पिकलेले केस
अधोलोकीं उतरावयास तुम्ही कारण व्हाल.
३० तर आपला दास माझा बाप याजकडे मी गेलों
आणि मुलगा मजबरोबर नाहीं असें त्यानें पाहिलें तर, या
मुलाचा जीव त्याच्या जिवाशीं अत्यंत जडलेला असल्या-
कारणानें ३१ मुलगा नाहीं हें पाहून तो तत्काळ प्राण
सोडील; अशानें आपल्या या दासांच्या पायीं आपला दास
आमचा पिता याला दुःख होऊन त्याचे पिकलेले केस
आम्हींच अधोलोकीं उतरिले असें होईल. ३२ बापापाशीं या
मुलाबद्दल मी जामीन झालों आहें; मीं आपल्या बापास
अशी खात्री दिली आहे कीं मीं यास आपणाकडे परत
न आणिलें तर आपला निरंतरचा गुन्हेगार होईन;
३३ तर आतां या मुलाऐवजीं या आपल्या दासास स्वामींनीं
गुलाम ठेवावें आणि या मुलास त्याच्या भावांबरोबर जाऊं
द्यावें. ३४ कारण हा मुलगा मजबरोबर नसला तर
मी आपल्या बापाकडे कसा जाऊं? नाहीं, नाहीं,
बापास दुःख होईल तें मला पाहवणार नाहीं.

४५ १ तेव्हां योसेफाभोवतीं लोक उभे होते त्या
सर्वांसमोर त्यास गहिंवर आवरेना; त्यानें
मोठ्यानें म्हटलें कीं सर्व लोकांस बाहेर घालवा.
योसेफानें आपल्या भावांस ओळख दिली तेव्हां
त्याच्याजवळ दुसरें कोणी नव्हतें. २ तो मोठमोठ्यानें
रडूं लागला; तें मिसरी लोकांनीं ऐकलें, आणि फारोच्या
घराण्याच्याहि कानीं तें गेलें. ३ योसेफ आपल्या
भावांस म्हणाला, मी योसेफ आहें; माझा पिता अजून
जीवंत आहे काय? त्याच्या भावांच्या तोंडून कांहीं
उत्तर निघेना; कारण ते सर्व त्याजपुढें घाबरले.
४ योसेफ आपल्या भावांस म्हणाला, अमळ जवळ
या; तेव्हां ते जवळ गेले. तो पुनः म्हणाला, तुमचा
भाऊ योसेफ, ज्याला तुम्ही मिसर देशांत विकून
टाकिलें तो मीच. ५ आतां कांहीं पस्तावा करूं नका;
तुम्हीं मला या देशांत विकून टाकिलें याबद्दल संताप
करून घेऊं नका; कारण तुमचे प्राण वांचवावे म्हणून
देवानें मला तुमच्यापुढें पाठविलें. ६ या देशांत आज
दोन वर्षें दुष्काळ आहे; आणखी पांच वर्षें अशीं
येणार आहेत कीं त्यांत नांगरणीकापणी कांहीं व्हाव-
याची नाहीं. ७ देवानें मला तुमच्यापुढें यासाठीं
पाठविलें कीं तुमचा पृथ्वीवर बचाव होऊन तुम्हीं शेष
राहावें आणि तुम्हांस जीवंत राखून तुमची वंशवृद्धि होऊं
द्यावी. ८ तर आतां तुम्हीं नव्हें तर देवानें मला येथें
पाठविलें; मला त्यानें फारोच्या बापाच्या ठिकाणीं
करून त्याच्या सर्व घरादाराचा स्वामी व सर्व मिसर
देशाचा शास्ता करून ठेविलें आहे.
९ तुम्ही त्वरा करून माझ्या बापाकडे जा आणि त्याला
सांगा, तुमचा पुत्र योसेफ म्हणतो कीं देवानें मला अवघ्या
मिसर देशाचा स्वामी केलें आहे तर मजकडे निघून या,
विलंब करूं नका; १० तुम्हीं गोशेन प्रांतांत वस्ती करून
राहावें; तुम्ही, तुमचे पुत्रपौत्र, शेरडेंमेंढरें, गुरेंढोरें व तुमचें
सर्व कांहीं घेऊन माझ्यासमीप राहावें. ११ कारण पांच वर्षें
दुष्काळ पडावयाचा आहे, तर येथें मी तुमचें संगोपन
करीन; अशानें तुम्ही, तुमच्या घरचे लोक व तुमचा सर्व
परिवार भिकेस लागणार नाहीं. १२ मी योसेफ

तुम्हांशीं प्रत्यक्ष बोलत आहें हें तुमच्या डोळ्यांना आणि
माझा भाऊ बन्यामीन याच्या डोळ्यांना दिसतच आहे.
१३ मिसरांतलें माझें सर्व वैभव आणि तुम्हीं डोळ्यांनीं
पाहिलेलें सगळें माझ्या बापास जाऊन सांगा, आणि
त्वरा करून माझ्या बापास इकडे घेऊन या. १४ तो
आपला भाऊ बन्यामीन याच्या गळां पडून रडला,
आणि बन्यामीनहि त्याच्या गळां पडून रडला.
१५ आणि सर्व भावांचे मुके घेऊन त्यांच्या गळां
पडून तो रडला; यानंतर त्याचे भाऊ त्याजशीं
बोलत बसले.

१६ योसेफाचे भाऊ आले आहेत अशी बातमी
फारोच्या वाड्यांत पोहंचली, ती ऐकून फारोस व त्याच्या
चाकरांस आनंद झाला. १७ फारो योसेफास म्हणाला,
तूं आपल्या भावांस सांग, एवढें करा कीं आपलीं
जनावरें लादून कनान देशास जा, १८ आणि आपला
बाप व आपलीं मुलेंमाणसें त्यांस घेऊन मजकडे या,
म्हणजे मिसर देशांत जें कांहीं उत्कृष्ट म्हणून आहे तें
मी तुम्हांस देईन व या देशांतले उत्तम पदार्थ तुम्हांस
खावयास मिळतील. १९ आतां तुला माझी आज्ञा आहे
कीं त्यांस सांग: एवढें करा, आपलीं मुलेंबाळें व
स्त्रिया यांसाठीं मिसर देशांतून गाड्या घेऊन जा,
आणि आपल्या बापासहि घेऊन या. २० आपल्या
मालमत्तेविषयीं हळहळूं नका, मिसर देशांत जें कांहीं
उत्कृष्ट आहे तें घ्या, तें तुमचेंच आहे.

२१ इस्राएलपुत्रांनीं तसें केलें; आणि फारोच्या हुकमा-
प्रमाणें योसेफानें त्यांस गाड्या व वाटेची शिधासामग्री
दिली. २२ त्यानें प्रत्येकास एक एक नवा पोषाख दिला
आणि बन्यामिनास तीनशें रुपये आणि पांच नवे पोषाख
दिले. २३ त्याप्रमाणेंच त्यानें आपल्या बापासाठीं
मिसरांतील उत्तम पदार्थ लादलेले दहा गाढव आणि
धान्य, भाकरी व वाटेसाठीं इतर अन्नसामग्री यांनीं
लादलेल्या दहा गाढवी रवाना केल्या. २४ या प्रकारें
त्यानें आपल्या भावांची रवानगी केल्यावर ते मार्गस्थ
झाले; जातांना तो त्यांस म्हणाला, संभाळा, वाटेनें
भांडूं नका. २५ ते मिसरांतून निघून वर कनान देशीं
आपला पिता याकोब याजकडे जाऊन पोहंचले.
२६ योसेफ अजून जीवंत आहे आणि अवघ्या मिसर
देशावर त्याची सत्ता आहे असें त्यांनीं त्यास सांगितलें.
तेव्हां त्याचें मन बेभान झालें, कारण त्याला त्यांचा
विश्वास येईना. २७ मग योसेफानें त्यांस सांगितलें
होतें तें सर्व त्यांनीं निवेदन केलें; आणि त्यांचा बाप
याकोब यानें त्याला नेण्यासाठीं योसेफानें पाठविलेल्या
गाड्या पाहिल्या तेव्हां त्याच्या जिवांत जीव आला.
२८ आणि इस्राएल म्हणाला, पुरें झालें, माझा पुत्र
योसेफ अद्यापि जीवंत आहे, मी त्याला मरण्यापूर्वी
जाऊन पाहीन.

४६ १ यानंतर इस्राएल आपल्या सर्वांसह
निघून बैरशेबास आला; तेथें त्यानें आपला बाप
इसहाक याच्या देवास यज्ञ केले. २ तेव्हां
रात्रीं दृष्टांतांत देव इस्राएलास बोलला, याकोबा,
याकोबा; तो म्हणाला, काय आज्ञा? ३ तो म्हणाला,
मी देव, तुझ्या पित्याचा देव आहें; तूं मिसरांत
जाण्यास भिऊं नको; तेथें तुझें मी एक मोठें राष्ट्र
करीन; ४ मी तुजबरोबर मिसरांत येईन, तेथून मी
तुला खात्रीनें परत आणीन, आणि योसेफ आपल्या
हातानें तुझे डोळे झाकील. ५ मग याकोब बैरशेबाहून
निघाला, आणि त्याला नेण्यासाठीं फारोनें पाठविलेल्या
गाड्यांत इस्राएलपुत्रांनीं आपला बाप याकोब,
आपलीं मुलेंबाळें आणि स्त्रिया बसवून नेल्या. ६ ते
आपलीं गुरेंढोरें आणि कनान देशांत संपादिलेलें धन
घेऊन मिसर देशांत आले; याप्रमाणें याकोब व
त्याची सर्व संतति मिसर देशास आली; ७ त्यानें
आपल्याबरोबर- आपले मुलगे व नातू, कन्या व नात्ती
वगैरे आपली सर्व संतति मिसरास आणिली.

८ इस्राएलाची संतति म्हणजे अर्थात् याकोब व
त्याचे पुत्रपौत्र मिसरांत गेले त्यांचीं नांवें हीं:—
याकोबाचा ज्येष्ठ पुत्र रऊबेन. ९ रऊबेनाचे पुत्र
हनोक, पल्लू, हेस्रोन व कार्मी. १० शिमोनाचे पुत्र
यमुवेल, यामीन, ओहाद, याकीन, सोहार आणि
कनानी स्त्रीपासून झालेला पुत्र शौल. ११ लेवीचे पुत्र:

बेर्योन, कहाथ व मरारी. १२ यहूदाचे पुत्र: एर,
ओनान, शेला, पेरेस व जेरह; यांपैकीं एर व ओनान
हे कनान देशीं मृत्यु पावले होते. पेरेसाचे पुत्र हेस्रोन
व हामूल. १३ इस्साखाराचे पुत्र: तोला, पुवा, योब
व शिम्रोन. १४ जबुलूनाचे पुत्र: सेरेद, एलोन व
याहलेल. १५ हे सर्व लेआचे पुत्र व तिची कन्या
दीना: हीं तिला याकोबापासून पदन-अराmांत झालीं;
त्यांचे पुत्र व कन्या मिळून तेहतीस होतीं.
१६ गादाचे पुत्र: सिफयोन, हग्गी, शूनी, एसबोन, एरी,
रोदी व अरेली. १७ आशेराचे पुत्र: इम्ना, इश्वा,
इश्वी व बरीया; आणि त्यांची बहीण सेराह; बरीयाचे
पुत्र: हेबेर व मालकीएल. १८ लाबानानें आपली
कन्या लेआ हिला दिलेल्या जिल्पेचे हे पुत्र, तिला हे
सोळा जण याकोबापासून झाले. १९ याकोबाची
बायको राहेल हिचे पुत्र: योसेफ व बन्यामीन.
२० मिसर देशांत ओनचा याजक पोटीफरा याची
कन्या आसनथ हिच्या पोटीं योसेफास मनश्शे व
एफ्राईम हे झाले. २१ बन्यामिनाचे पुत्र: बेला, बेकेर,
आशबेल, गेरा, नामान, एही, रोष, मुप्पीम, हुप्पीम
आणि आर्द. २२ हे पुत्र याकोबापासून राहेलीस
झाले; ते सर्व चौदा जण होते. २३ दानाचा पुत्र
हुशीम. २४ नफतालीचे पुत्र: यासहेल, गूनी, येसेर
आणि शिल्लेम. २५ लाबानानें आपली कन्या राहेल
हिला दिलेल्या बिल्हेपासून याकोबास हे पुत्र झाले; ते
एकंदर सात जण होते. २६ याकोबाच्या वंशांतलीं जीं
मनुष्यें मिसरांत गेलीं तीं याकोबाच्या पुत्रांच्या स्त्रिया
खेरीज करून सहासष्ट जण होतीं. २७ योसेफास
मिसर देशांत झालेले दोन पुत्र, हे आणखी दोघे जण
मिळून एकंदर याकोबाच्या घराण्यांतले मिसर देशांत
सत्तर जण होते.

२८ योसेफानें गोशेन प्रांताची वाट दाखवावी
म्हणून याकोबानें यहूदास आपल्यापुढें त्याजकडे
पाठविलें; याप्रमाणें ते गोशेन प्रांतांत आले. २९ योसेफ
आपला रथ सिद्ध करून आपला बाप इस्राएल यास
भेटावयास गोशेन प्रांतीं गेला; त्यास भेटून त्याच्या
गळ्यास त्यानें मिठी मारिली आणि त्याच्या मानेवर मान
टाकून तो फार वेळ रडला. ३० तेव्हां इस्राएल
योसेफास म्हणाला, तूं अजून जीवंत असून तुझें मुख
मीं पाहिलें, आतां मला खुशाल मरण येवो. ३१ योसेफ
आपल्या बंधूंस आणि आपल्या पित्याच्या घरच्यांस
म्हणाला, मी जाऊन फारोला खबर देतों कीं कनान
देशांत असलेले माझे भाऊ व माझ्या पित्याच्या घरचीं
माणसें मजकडे आलीं आहेत; ३२ हे मेंढरें पाळणारे,
गुरेंढोरें पाळणारे आहेत म्हणून ते आपलीं
शेरडेंमेंढरें, गुरेंढोरें व आपलें सर्वस्व घेऊन आले
आहेत. ३३ फारो तुम्हांस बोलावून विचारील कीं
तुमचा धंदा काय? ३४ तेव्हां तुम्ही सांगा कीं बाळ-
पणापासून आजवर आम्ही आपले दास गुरेंढोरें बाळगून
आहों; आमचा व आमच्या वडिलांचाहि हाच धंदा
आहे; अशानें तुम्हांस गोशेन प्रांतांत राहावयास
सांपडेल; कारण जेवढा म्हणून मेंढपाळ आहे तेवढ्यांची
मिसरी लोकांस किळस वाटते.

## ४७

१ मग योसेफानें फारोकडे जाऊन त्यास
सांगितलें, माझा बाप व माझे भाऊ आपलीं
शेरडेंमेंढरें, गुरेंढोरें आणि आपलें सर्वस्व घेऊन
कनान देशांतून निघून आले आहेत; हल्लीं ते गोशेन
प्रांतांत आहेत. २ त्यानें आपल्या भावांपैकीं पांच
जणांस फारोपुढें नेऊन उभें केलें. ३ फारोनें
योसेफाच्या भावांस विचारिलें, तुमचा धंदा काय? ते
फारोला म्हणाले, आपल्या दासांचा व त्यांच्या वडिलांचा
धंदा मेंढरें पाळण्याचा आहे. ४ ते फारोस आणखी
म्हणाले, आम्ही या देशांत कांहीं दिवस राहावयास
आलों आहों; कनान देशांत जबर दुष्काळ पडल्यामुळें
आपल्या दासांच्या शेरडांमेंढरांस चारा राहिला नाहीं, तर
कृपा करून आपल्या दासांस गोशेन प्रांतांत राहूं द्यावें.
५ फारो योसेफास म्हणाला, तुझा बाप व तुझे भाऊ
तुजकडे आले आहेत; ६ अवघा मिसर देश तुझ्यापुढें
आहे; ह्या देशांतल्या उत्तम भागीं आपल्या बापास व
भावांस वस्ती करूं दे; त्यांस गोशेन प्रांतांत राहूं दे;
त्यांच्यापैकीं जीं कोणी हुषार माणसें तुला ठाऊक

असतील त्यांस माझ्या गुराख्यांचे नायक कर.
७ योसेफानें आपला बाप याकोब यास आणून
फारोपुढें हजर केलें, तेव्हां याकोबानें फारोस आशी-
र्वाद दिला. ८ फारोनें याकोबास विचारिलें कीं तुझें
वय किती वर्षांचें आहे? ९ याकोब फारोस म्हणाला,
माझी जीवितयात्रा एकशेंतीस वर्षांची झाली आहे;
माझ्या आयुष्याचे दिवस अल्प असून दुःखाचे गेले,
आणि ते माझ्या वडिलांच्या जीवितयात्रेच्या आयुष्य-
मर्यादेस जाऊन पोंचले नाहींत. १० याकोब फारोस
आशीर्वाद देऊन त्याच्यापुढून निघून गेला. ११ नंतर
योसेफानें आपला बाप व भाऊ यांच्या राहण्याची
व्यवस्था केली; त्यानें फारोच्या आज्ञेनुसार मिसर
देशाच्या उत्तम भागीं म्हणजे रामसेस प्रांतांत त्यांस
वतन करून दिलें. १२ योसेफानें आपला बाप, आपले
भाऊ आणि आपल्या बापाच्या घरचीं माणसें यांस
त्यांच्या मुलाबाळांच्या संख्येप्रमाणें अन्नसामग्री पुरवून
त्यांचें संगोपन केलें.

१३ त्या समयीं सर्व देशांत खावयास अन्न म्हणून
राहिलें नाहीं; दुष्काळ एवढा तीव्र होता कीं, त्यामुळें
मिसर देश व कनान देश हैराण झाले. १४ मिसर
देशांतील व कनान देशांतील लोकांनीं विकत घेतलेल्या
धान्याच्या मोबदला जेवढा पैसा मिळाला तेवढा पैसा
जमा करून योसेफानें फारोच्या घरीं पोंचता केला.
१५ मिसर देशांत व कनान देशांत कांहीं पैसा उरला
नाहीं, तेव्हां सर्व मिसरी लोक योसेफाकडे येऊन
म्हणाले, आम्हांस अन्न द्या. आपल्यादेखत आम्हीं कां
उपाशीं मरावें? आमचा पैका सर्व संपला. १६ योसेफ
म्हणाला, तुमचा पैसा संपला तर तुमचीं गुरें द्या म्हणजे
त्यांच्या मोबदला तुम्हांस अन्न देईन. १७ तेव्हां त्यांनीं
आपलीं गुरें योसेफाकडे आणिलीं; त्यांचे घोडे, शेरडें-
मेंढरें, गुरेंढोरें व गाढवें घेऊन त्यांच्या मोबदला त्यांस
तो अन्न पुरवूं लागला; वर्षभर त्यांचीं सगळीं गुरें
घेऊन त्यांस अन्न देऊन त्यांचें पोषण केलें. १८ तें
वर्ष संपलें तेव्हां पुढील वर्षीं ते त्याजकडे येऊन
म्हणाले, आमचा पैका सर्व संपला, हें आम्ही स्वामीं-
पासून चोरीत नाहीं; आमच्या गुरांढोरांचे कळप स्वामींचे
झाले आहेत, आतां स्वामींसमोर सादर करण्यास
आमचीं शरीरें व आमच्या जमिनी यांखेरीज आमच्या-
पाशीं कांहींएक राहिलें नाहीं; १९ आपल्यादेखत
आम्हीं कां मरावें आणि आमचा व आमच्या शेतांचा
नाश कां व्हावा? आम्ही व आमच्या जमिनी यांस विकत
घेऊन आम्हांस अन्न द्या, आम्ही व आमच्या जमिनी
यांजवर फारोची मालकी होवो; आम्हांस बियाणें द्या
म्हणजे आम्ही जगूं, मरावयाचें नाहीं आणि आमच्या
जमिनी उजाड पडावयाच्या नाहींत.

२० या प्रकारें योसेफानें मिसरांतील सारी शेतजमीन
फारोच्या नांवें विकत घेतली; दुष्काळ भारी पडल्यामुळें
प्रत्येक मिसऱ्यानें अन्नासाठीं आपलीं शेतें विकिलीं; सर्व भूमि
फारोची झाली. २१ त्यानें देशाच्या ह्या टोकापासून
त्या टोकापर्यंतच्या सर्व लोकांस दास केलें. २२ मात्र
याजकांची जमीन त्यानें घेतली नाहीं, कारण याजकांस
फारोकडून नेमणूक होती आणि फारोनें दिलेल्या
नेमणुकींत ते निर्वाह करीत; म्हणून त्यांनीं ती विकली
नाहीं. २३ मग योसेफ लोकांस म्हणाला, आज मीं
तुमच्या जमिनींसह तुम्हांस फारोच्या नांवें विकत
घेतलें आहे; हें बियाणें घ्या व जमिनी पेरा.
२४ तुम्हीं हंगामाच्या वेळीं उत्पन्नाचा पांचवा हिस्सा
फारोस द्यावा; बाकीचे चार हिस्से तुमच्या मालकीचे
होतील; ते शेताच्या बियाण्यासाठीं आणि तुम्हांस,
तुमच्या घरच्यांस आणि तुमच्या मुलांबाळांस खाण्यासाठीं
ठेवा. २५ ते म्हणाले, आपण आमचे प्राण वांचविले,
स्वामींची आम्हांवर कृपादृष्टि राहो, आम्ही फारोचे दास
होऊन राहूं. २६ फारोस उत्पन्नाचा पांचवा भाग द्यावा
हा नियम योसेफानें मिसर देशाच्या जमिनीस लावून
दिला तो आजवर चालत आहे; मात्र याजकांच्या जमिनी
फारोच्या झाल्या नाहींत. २७ इस्राएल लोक मिसर
देशांतल्या गोशेन प्रांतांत वस्ती करून राहिले; तेथें
त्यांनीं वतनें केलीं; ते फलद्रूप होऊन बहुगुणित झाले.

२८ याकोब मिसर देशांत सतरा वर्षें जगला;
याप्रमाणें याकोबाचें सगळें वय एकशेंसत्तेचाळीस

वर्षांचें झालें. २९ इस्राएलाचा अंतकाळ समीप आला
तेव्हां त्यानें आपला पुत्र योसेफ यास बोलावून आणून
म्हटलें, तुझी मजवर कृपादृष्टि असेल तर मजशीं तूं
ममतेनें व सत्यतेनें वागून मला मिसर देशांत पुरणार
नाहींस अशी शपथ माझ्या मांडीखालीं हात ठेवून वाहा;
३० मी आपल्या वडिलांबरोबर निद्रा घेण्यास गेलों म्हणजे
मला मिसर देशाबाहेर घेऊन जा आणि माझ्या वडिलां-
च्या कबरस्तानांत ठेव. तो म्हणाला, आपल्या सांगण्या-
प्रमाणें मी करीन. ३१ तो म्हणाला, मजपाशीं शपथ
वाहा; तेव्हां त्यानें शपथ वाहिली; आणि इस्राएलानें
पलंगाच्या उशावर आपलें शीर लववून नमन केलें.

## ४८

१ या गोष्टी घडल्यानंतर कोणीं योसेफास
सांगितलें, पाहा, आपला बाप आजारी आहे;
तेव्हां तो आपले दोन पुत्र मनश्शे व एफ्राईम
यांस बरोबर घेऊन त्याजकडे गेला. २ आपला पुत्र योसेफ
आपल्याकडे येत आहे असें कोणीं याकोबास कळविलें तेव्हां
इस्राएल सावरून खाटेवर बसला; ३ याकोब योसेफास
म्हणाला, सर्वसमर्थ देवानें कनान देशांतल्या लूज
नगरापाशीं मला दर्शन देऊन आशीर्वाद दिला तो असा:
४ ऐक, मी तुला फलद्रूप करून बहुगुणित करीन,
तुजपासून राष्ट्रसमुदाय उत्पन्न करीन आणि तुझ्यामागें
तुझ्या संततीस हा देश निरंतरचें वतन करून देईन.
५ मी मिसरांत तुजकडे येण्यापूर्वी, तुला जे दोन
पुत्र मिसरांत झाले ते माझेच आहेत; जसे रऊबेन
व शिमोन तसेच एफ्राईम व मनश्शे हेहि माझेच होत.
६ त्यांच्यामागून जे पुत्र तुला होतील ते तुझे; त्यांचें
वतन त्यांच्या भावांच्या नांवानें चालेल. ७ मी पदन
येथून येत असतां एफ्राथ गांव कांहींसा दूर राहिला
तों कनान देशीं रस्त्यांतच राहेलीच्या मरणानें
मला दुःख झालें; एफ्राथ म्हणजे बेथलहेम याच्या
वाटेवर तिला पुरिलें.

८ इस्राएलाच्या दृष्टीस योसेफाचे पुत्र पडले
तेव्हां तो म्हणाला, हे कोण? ९ योसेफ आपल्या
बापास म्हणाला, हे माझे पुत्र, देवानें मला हे
या देशीं दिले. तेव्हां तो म्हणाला, त्यांस माझ्या-
जवळ आण म्हणजे मी त्यांस आशीर्वाद देईन.
१० इस्राएलाची दृष्टि वयाच्या मानानें मंद झाली
होती, म्हणून त्याला बरोबर दिसत नव्हतें. योसेफानें
त्यांस त्याच्याजवळ नेलें, तेव्हां त्यानें त्यांचें चुंबन
घेऊन त्यांस आलिंगन दिलें. ११ इस्राएल योसेफास
म्हणाला, तुझें तोंड पुनरपि माझ्या दृष्टीस पडेल याची
मला कल्पना नव्हती, पण आतां तर देवानें मला
तुझी संततिहि पाहूं दिली आहे. १२ मग योसेफानें
त्यांस आपल्या गुडघ्यांच्या मधून काढिलें आणि भूमी-
पर्यंत लवून नमन केलें. १३ मग त्या दोघांस, एफ्राई-
मास आपल्या उजव्या हातीं म्हणजे इस्राएलाच्या
डावीस आणि मनश्शास आपल्या डाव्या हातीं म्हणजे
इस्राएलाच्या उजवीस असें धरून त्याच्याजवळ नेलें.
१४ इस्राएलानें आपला उजवा हात पुढें करून एफ्राई-
माच्या म्हणजे धाकट्याच्या मस्तकीं ठेविला आणि
आपला डावा हात मनश्शाच्या मस्तकीं ठेविला; त्यानें
आपले हात उजवेडावे केले; मनश्शे तर वडील होता.
१५ त्यानें योसेफास आशीर्वाद देऊन म्हटलें, ज्या
देवासन्मुख माझे वडील अब्राहाम व इसहाक चालले,
माझ्या जन्मापासून आजवर ज्या देवानें माझें पालन
केलें, १६ ज्या दूतानें मला सर्व आपदांतून रक्षिलें तो
या मुलांचें अभीष्ट करो; माझें नांव व माझे पूर्वज
अब्राहाम व इसहाक यांचें नांव हे चालवोत आणि
पृथ्वीवर यांचा समुदाय वाढो. १७ आपल्या बापानें
उजवा हात एफ्राईमाच्या मस्तकीं ठेविला हें योसेफानें
पाहिलें तेव्हां त्यास वाईट वाटलें आणि एफ्राईमाच्या
मस्तकावरील बापाचा हात काढून मनश्शाच्या मस्तकीं
ठेवावा म्हणून त्यानें तो धरिला. १८ योसेफ आपल्या
बापास म्हणाला, बाबा, असें नाहीं, माझा ज्येष्ठ पुत्र
हा आहे, आपला उजवा हात याच्या मस्तकीं ठेवा.
१९ त्याचें सांगणें न मानून त्याचा बाप म्हणाला,
मुला, हें मला ठाऊक आहे, मला ठाऊक आहे;
त्याचेंहि एक राष्ट्र बनून तो महान् होईल, तथापि
त्याचा धाकटा भाऊ त्याजहून महान् होईल आणि
त्याच्या वंशाचा राष्ट्रसमुदाय बनेल. २० त्या दिवशीं

त्यानें त्यांस हा आशीर्वाद दिला: इस्राएल लोक तुझें
नांव घेऊन आशीर्वाद देतांना म्हणतील कीं एफ्राईम
व मनश्शे यांच्याप्रमाणें देव तुझें कल्याण करो;
येणेंप्रमाणें त्यानें एफ्राईमास मनश्शाहून वरचढ केलें.
२१ इस्राएल योसेफास म्हणाला, पाहा, मी तर आतां
मरणार, तथापि देव तुम्हांबरोबर राहील आणि तुम्हांस
तुमच्या पूर्वजांच्या देशीं परत नेईल. २२ मी तुला
तुझ्या भावांच्याहून जमिनीचा एक अधिक विभाग
देतों, तो मी माझ्या तरवारीच्या व धनुष्याच्या
जोरावर अमोरी लोकांपासून घेतला.

४९ १ मग याकोबानें आपल्या पुत्रांस बोलावून
म्हटलें, तुम्ही सर्व जमा व्हा म्हणजे पुढील
काळीं तुमचें कायकाय होईल हें मी तुम्हांस
सांगतों.

२ याकोबपुत्रहो, एकत्र होऊन ऐका;
तुमचा पिता इस्राएल याजकडे कान द्या.
३ रऊबेना, तूं माझा ज्येष्ठ, माझें बळ, माझ्या
पौरुषाचें प्रथम फळ आहेस;
प्रतिष्ठेचें श्रेष्ठत्व आणि सामर्थ्याचें श्रेष्ठत्व प्रत्यक्ष तूंच.
४ तथापि तुला पाण्यासारखा ऊत असल्यामुळें तुला
श्रेष्ठत्व मिळावयाचें नाहीं;
कारण तूं आपल्या पित्याच्या खाटेवर चढलास;
तूं ती भ्रष्ट केली; तो माझ्या शय्येवर चढला.
५ शिमोन व लेवी हे सख्खे भाऊ आहेत;
त्यांच्या तरवारी प्रत्यक्ष बलात्काराचीं हत्यारें होत.
६ माझ्या जिवा, त्यांच्या कारस्थानांत शिरूं नको;
माझ्या शीला, त्यांच्या मंडळांत सामील होऊं नको;
कारण रागाच्या भरांत त्यांनीं मनुष्यघात केला;
त्यांनीं उन्मत्तपणानें बैलांच्या पायांच्या शिरा
तोडिल्या.
७ त्यांच्या कोपाला धिक्कार असो, तो अतिदारुण होय;
त्यांच्या रोषाला धिक्कार असो, तो फार
निष्ठुर होय;
मी त्यांची याकोबांत फांकाफांक करीन,
इस्राएलांत त्यांस विखरीन.
८ हे यहूदा, तुझे बंधु तुझा धन्यवाद करितील;
तुझा हात तुझ्या शत्रूंची मानगुटी धरील;
तुझ्या बापाचे पुत्र तुजपुढें नमतील.
९ यहूदा सिंहाचा छावा आहे;
माझ्या पुत्रा, तूं शिकार करून डोंगरांत गेला आहेस;
तो सिंहासारखा, सिंहिणीसारखा दबा धरून
बसला आहे,
त्याला कोण छेडणार?
१० यहूदाकडचें राजवेत्र ज्याचें आहे तो येईतोंवर
तें त्याजकडून जाणार नाहीं,
शासनदंड त्याच्या पायांमधून ढळणार नाहीं;
राष्ट्रें त्याचीं आज्ञांकित होतील.
११ तो आपलें तरुण गाढव द्राक्षलतेला,
आपल्या गाढवीचें शिंगरूं उत्तम द्राक्षलतेला
बांधून ठेवील;
तो आपलें वस्त्र द्राक्षारसांत,
आपला पेहराव द्राक्षांच्या रक्तांत धुईल;
१२ त्याचे नेत्र द्राक्षारसानें आरक्त होतील;
त्याचे दांत दुधानें शुभ्र होतील.
१३ जबुलून सागरतीरीं वस्ती करील;
तो जहाजांचें बंदरच होऊन राहील;
त्याची सरहद्द सीदोनापर्यंत जाईल.
१४ इस्साखार हा मजबूत गर्दभ आहे;
तो मेंढवाड्यांच्या दरम्यान दबकून बसतो;
१५ विश्रांतीला हें चांगलें स्थळ आहे,
हा देश मनोहर आहे असें पाहून
भार वाहण्यास त्यानें खांदा दिला;
तो बिगारकाम करणारा दास बनला.
१६ दान इस्राएलाचा एक वंश असून
आपल्या लोकांचा कैवार घेईल.

---

१ **अथवा:** यहूदा शिलोस येईतोंवर
त्याच्याकडून राजवेत्र जाणार नाहीं
**अथवा:** शिलो येईतोंवर
यहूदाकडून राजवेत्र जाणार नाहीं

१७ दान हा मार्गांतला सर्प,
वाटेवरचा नाग होईल,
हा घोड्याच्या टांचेस दंश करितो
तेव्हां त्यावरला स्वार उलथून मागें पडतो.
१८ हे परमेश्वरा, मी तुजकडून उद्धार होण्याची प्रतीक्षा करीत आहें.
१९ गाद याजवर एक लढाऊ टोळी गर्दी करील;
तथापि तो त्यांच्या पिछाडीवर छापा घालील.
२० आशेर आपलें पौष्टिक अन्न निपजवील,
तो राजास योग्य अशीं मिष्टान्नें पुरवील.
२१ नफताली मोकळी सुटलेली हरिणीच होय,
तो सुंदर भाषणें करणारा होईल.
२२ योसेफ हा फलवती लतेची एक शाखाच आहे,
निर्झरापाशीं लावलेल्या फळझाडाची शाखा आहे.
त्याच्या डाहळ्या भिंतीवर चढून पसरल्या आहेत.
२३ तिरंदाजांनीं त्यास त्रस्त केलें,
त्यास बाण मारिले, त्याचा पिच्छा पुरविला;
२४ तथापि त्याचें धनुष्य मजबूत राहिलें;
याकोबाचा समर्थ देव, इस्राएलाचा मेंढपाळ, इस्राएलाचा दुर्ग
याच्या द्वारें त्याचे भुज स्फुरण पावले.
२५ तुझें साहाय्य करणारा तुझ्या पित्याचा देव,
तुला वरदानें देणारा सर्वसमर्थ देव याजकडून हें होईल,
वरून आकाशाचीं व खालून जलाशयाचीं वरदानें तुला तो देईल,
दुधाचीं व संततीचीं वरदानें तो तुला देईल.
२६ तुझ्या पित्यानें कथिलेलीं वरदानें
प्राचीन पर्वतांच्या वरदानांहून श्रेष्ठ आहेत,
सनातन डोंगरापासून प्राप्त होणाऱ्या इष्ट वस्तूंहून श्रेष्ठ आहेत;
हे आशीर्वाद योसेफाच्या मस्तकीं,
आपल्या भाऊबंदांत जो प्रमुख त्याच्या शिरीं येवोत.
२७ बन्यामीन हा फाडून टाकणारा लांडगा आहे;
सकाळीं तो शिकार भक्षील,
सायंकाळीं लुटीचे वांटे करील.

२८ हे इस्राएलाचे बारा वंश होत. त्यांचा पिता
त्यांस आशीर्वाद देतांना वचनें बोलला तीं हींच;
एकेकास त्याच्यात्याच्यापरी त्यानें आशीर्वाद दिला.
२९ मग त्यानें त्यांस आज्ञा केली कीं मी लवकरच
स्वजनांस जाऊन मिळणार, तर मला नेऊन एफ्रोन
हित्ती याच्या शेतांतल्या गुहेंत माझ्या वडिलांपाशीं
पुरा. ३० कनान देशांतील मम्रेसमोरील मकपेला नामक
शेतांतील गुहा, जी अब्राहामानें शेतासुद्धां एफ्रोन हित्ती
याजपासून आपल्या मसेचें कबरस्तान व्हावें म्हणून
विकत घेतली होती तीच ही. ३१ तेथेंच अब्राहाम
व त्याची स्त्री सारा यांस पुरिलें; इसहाक व त्याची
स्त्री रिबका यांसहि तेथें पुरिलें; तेथेंच मीं लेआसहि
पुरिलें. ३२ तें शेत व त्यांतील गुहा हीं हेथींपासून
खरेदी केलीं आहेत. ३३ आपल्या पुत्रांस आज्ञा
करण्याचें संपविल्यावर याकोबानें अंथरुणावर आपले
पाय आखडून प्राण सोडिला, आणि तो स्वजनांस जाऊन
मिळाला. १ मग योसेफ आपल्या बापाच्या
५० तोंडाशीं तोंड लावून रडला आणि त्यानें त्याचें चुंबन
घेतलें. २ योसेफानें आपल्या पदरच्या वैद्यांस
आपल्या बापाच्या प्रेतांत मसाला भरावा म्हणून आज्ञा
केली; त्याप्रमाणें त्या वैद्यांनीं इस्राएलाच्या प्रेतांत मसाला
भरिला. ३ या कार्यास चाळीस दिवस लागले; प्रेतांत
मसाला भरण्यास इतके दिवस लागत असत; आणि
मिसरी लोकांनीं सत्तर दिवस त्याच्यासाठीं शोक केला.

४ शोकाचे दिवस संपल्यावर योसेफ फारोच्या
घराण्यांतल्या लोकांस म्हणाला, तुमची कृपादृष्टि
मजवर असेल तर फारोच्या कानावर एवढें घाला कीं,
५ माझ्या बापानें मजकडून आणभाक घेऊन म्हटलें
कीं पाहा, मी आतां मरणार; तर कनान देशांत जी
कबर मीं आपल्यासाठीं खोदविली आहे तींत मला
नेऊन मूठमाती दे. मला तिकडे जाऊन माझ्या
बापास पुरण्याची आज्ञा द्यावी. मी परत येईन. ६ फारो
म्हणाला, जा, तुझ्या बापानें तुजकडून आणभाक
घेतल्याप्रमाणें त्याला मूठमाती दे. ७ मग योसेफ

आपल्या बापास मूठमाती देण्यास निघून गेला, आणि
फारोचे सेवक म्हणजे त्याच्या घराण्यांतले वडील जन
व मिसर देशांतले सर्व वडील जन त्याजबरोबर गेले;
८ योसेफाच्या घरचे सर्व लोक, त्याचे भाऊ आणि
त्याच्या बापाच्या घरचे सर्व लोक गेले; आपलीं
मुलेंबाळें, शेरडेंमेंढरें, गुरेंढोरें हीं मात्र त्यांनीं गोशेन
प्रांतांतच मागें ठेविलीं. ९ त्याजबरोबर रथ व स्वार
गेले; अशी त्याची मोठी स्वारी निघाली. १० यार्देने-
पलीकडे अटादाच्या खळ्यापाशीं ते आले तेव्हां त्यांनीं
तेथें मोठा विलाप केला; योसेफानें तेथें आपल्या
बापासाठीं सात दिवस शोक करावयाचें ठरविलें.
११ अटादाच्या खळ्यांत कनानी लोकांनीं तो विलाप
पाहिला तेव्हां ते म्हणाले, हा मिसरी लोकांचा
महाशोक आहे; त्यावरून त्या ठिकाणाचें नांव अबेल-
मिस्राइम पडलें, तें यार्देनेपलीकडे आहे. १२ इस्राएलानें
आपल्या पुत्रांस आज्ञा केली होती त्याप्रमाणें त्यांनीं
केलें; १३ त्यांनीं त्यास कनान देशीं नेऊन मम्रे-
समोरील मकपेला शेताच्या गुहेंत मूठमाती दिली;
अब्राहामानें एफ्रोन हित्ती याजपासून आपल्या मालकीचें
कबरस्तान व्हावें म्हणून शेतासकट विकत घेतली
होती तीच ही गुहा. १४ योसेफानें आपल्या बापास
मूठमाती दिल्यावर तो, त्याचे भाऊ व त्याच्या बापाच्या
मूठमातीसाठीं त्याच्याबरोबर गेले होते ते सर्व मिसर
देशीं परत गेले.

१५ आपला बाप मेला हें मनांत आणून योसेफाचे
भाऊ म्हणूं लागले, आतां योसेफ आमचें वैर
करील व आपण त्याचें जें वाईट केलें त्याचें तो
पुरें उसनें फेडील. १६ त्यांनीं योसेफास सांगून
पाठविलें कीं आपल्या पित्यानें मरणापूर्वी आम्हांस आज्ञा
केली ती अशी: १७ तुम्ही योसेफास सांगा, तुझ्या
भावांनीं तुझें वाईट केलें हा त्यांचा गुन्हा व पातक
यांची क्षमा कर; आतां आपल्या पित्याच्या देवाचे जे
आम्ही दास त्या आमचा अपराध क्षमा करा अशी
आम्ही विनंति करितों. हें भाषण ऐकून योसेफास रडूं
आलें. १८ त्याचे भाऊ स्वतः त्याजकडे जाऊन त्याच्या
पायांशीं लागले व म्हणाले, पाहा, आम्ही आपले दास
आहों. १९ योसेफ त्यांस म्हणाला, भिऊं नका, मी
का देवाच्या ठिकाणीं आहें? २० तुम्ही माझें वाईट
योजिलें, पण देवाची योजना बऱ्यासाठींच होती कीं
तेणेंकरून बहुत लोकांचे प्राण वांचावे; हें तुम्ही आज
पाहतच आहां. २१ तर आतां भिऊं नका; मी तुमचें
व तुमच्या मुलांबाळांचें संगोपन करीन. या प्रकारें
त्यानें त्यांचें सांत्वन करून त्यांच्या मनास धीर दिला.

२२ योसेफ आपल्या बापाच्या घरच्या माणसांसह
मिसर देशांत राहिला. तो एकशेंदहा वर्षें जगला.
२३ योसेफानें एफ्राइमाच्या तिसऱ्या पिढीचीं मुलें
पाहिलीं; तसेंच मनश्शाचा पुत्र माखीर याचीं मुलें
त्यानें आपल्या मांडीवर खेळविलीं. २४ नंतर योसेफ
आपल्या भावांस म्हणाला, मी आतां मरणार; देव
खरोखर तुमची भेट घेईल व जो देश अब्राहाम,
इसहाक व याकोब यांस त्यानें प्रतिज्ञापूर्वक देऊं केला
आहे त्यांत या देशांतून घेऊन जाईल. २५ मग
देव खात्रीनें तुमची भेट घेईल, असें योसेफानें
इस्राएलपुत्रांस सांगून आपल्या अस्थि तेथून घेऊन
जाण्याविषयीं त्यांच्याकडून आणभाक करविली.
२६ योसेफ एकशेंदहा वर्षांचा होऊन मृत्यु पावला;
त्यांनीं त्याच्या प्रेतांत मसाला भरून तें एका पेटींत
घालून मिसर देशांत ठेविलें.

# निर्गम



१ याकोबासह जे इस्राएलपुत्र सहकुटुंब मिसर
१ देशांत गेले त्यांचीं नांवें हीं: २ रऊबेन, शिमोन,
लेवी व यहूदा; ३ इस्साखार, जबुलून व बन्या-
मीन; ४ दान व नफताली, गाद व आशेर. ५ याकोबा-
पासून झालेले एकंदर सत्तर जण होते; योसेफ हा
मिसरांत होताच. ६ नंतर योसेफ व त्याचे सर्व बंधु
आणि त्या पिढीचे सर्व जण गुजरले. ७ इस्राएलपुत्र
फलद्रूप झाले व अतिशयित वृद्धि पावून बहुगुणित
झाले; ते महाप्रबळ होऊन त्यांनीं देश भरून गेला.
८ पुढें योसेफाची ज्यास माहिती नव्हती असा एक
नवीन राजा मिसर देशावर आला. ९ तो आपल्या
लोकांस म्हणाला, पाहा, या इस्राएल वंशाचे लोक
आपल्यापेक्षां संख्येनें व बलानें अधिक झाले आहेत;
१० तर चला, आपण त्यांच्याशीं धूर्तपणानें वागूं या;
नाहींतर ते संख्येनें फार वाढतील आणि एकादा युद्धाचा
प्रसंग आला म्हणजे ते आपल्या शत्रूंला सामील होऊन
आपल्याशीं कदाचित् लढतील व या देशांतून निघून
जातील. ११ त्यांनीं त्यांजवर कामाचा बोजा लादून त्यांस
जेरीस आणावें, या हेतूनें त्यांजपासून बिगार घेणारे
मुकादम नेमिले. तेव्हां त्यांनीं फारोसाठीं पिथोम व
रामसेस हीं कोठारांचीं नगरें बांधिलीं; १२ पण जों जों
त्यांनीं त्यांस पीडिलें तों तों ते वाढून बहुगुणित झाले
व त्यांचा चोहोंकडे विस्तार झाला. त्यांस इस्राएल-
वंशजांची किळस वाटूं लागली; १३ म्हणून मिसरी लोक
इस्राएलवंशजांपासून सक्तीनें काम घेऊं लागले; १४
त्यांजकडून मातीचा गारा व विटा करवीत आणि त्यांस
शेतांत हरतऱ्हेचीं कामें करावयास लावीत; असल्या
बिकट कामानें त्यांस जीव नकोसा झाला; त्यांजकडून
रवीत तीं सर्व कामें मोठ्या सक्तीचीं असत.
१५ दोन इब्री सुइणी होत्या; एकीचें नांव शिफ्रा व
दुसरीचें नांव पुवा; त्यांस मिसरच्या राजानें आज्ञा
केली कीं, १६ तुम्ही इब्री स्त्रियांचें बाळंतपण करीत
असतां, प्रसूत होण्याच्या जागीं त्या बसल्या म्हणजे
नीट पाहा, आणि मुलगा असला तर त्यास जिवें मारा;
पण मुलगी असली तर तिला जिवंत ठेवा. १७ त्या
सुइणी देवाचें भय बाळगणाऱ्या होत्या, म्हणून त्यांनीं
मिसरी राजाच्या हुकमाप्रमाणें न करितां नरबाळकांसहि
जीवंत राहूं दिलें. १८ तेव्हां मिसरी राजानें त्या सुइणींस
बोलावून विचारलें, तुम्ही हें काय करितां? नरबाळकांस
कां जीवंत राहूं देतां? १९ त्या सुइणी फारोस म्हणाल्या,
इब्री बायका कांहीं मिसरी बायकांप्रमाणें नाहींत; त्या
फार जोमदार आहेत, आणि सुईण जाऊन पोंचण्या-
पूर्वींच त्या प्रसूत होतात. २० यावद्दल देवानें त्या
सुइणींचें कल्याण केलें; इस्राएल लोक तर बहुतपट वाढून
फार प्रबल झाले. २१ त्या सुइणी देवाचें भय बाळग-
णाऱ्या होत्या म्हणून त्यानें त्यांचीं घराणीं वसविलीं.
२२ तेव्हां फारोनें आपल्या सर्व लोकांस आज्ञा केली
कीं इब्र्यांना होतील तेवढे सगळे मुलगे नदींत टाका
आणि होतील तेवढ्या सगळ्या मुली जिवंत ठेवा.
१ लेवी वंशांतल्या एका पुरुषानें जाऊन लेवीची
२ कन्या बायको केली. २ ती स्त्री गर्भवती होऊन
तिला मुलगा झाला; तो बालक सुंदर आहे हें पाहून
तिनें त्याला तीन महिने छपवून ठेविलें. ३ पुढें त्याला
छपवून ठेवितां येईना म्हणून तिनें लव्हाळ्यांचा एक
पेटारा करून त्याला डामर व राळ चोपडली; त्या पेटा-
ऱ्यांत तिनें त्या बाळकास घालून नदीतीराच्या लव्हाळ्यांत
नेऊन ठेविलें; ४ आणि त्याचें काय होईल* तें पाहाव-
यास त्याची बहीण दूर उभी राहिली. ५ मग फारोची
कन्या नदीवर स्नान करावयास आली; तिच्या
दासी नदीच्या कडेनें चालल्या असतां लव्हाळ्यांमध्यें

तो पेटारा तिच्या नजरेस पडला; तो आणावयास तिनें
आपल्या एका दासीस सांगितलें. ६ तो उघडून पाहतां
तिच्या दृष्टीस तें बालक पडलें; तें रडत होतें. तिला
त्याचा कळवळा आला व ती म्हणाली हें कोणातरी
इब्र्याचें बालक आहे. ७ तेव्हां त्या बालकाची बहीण
फारोच्या कन्येस म्हणाली, आपणाकरितां मुलास दूध
पाजावयासाठीं इब्री स्त्रियांतून एकादी दाई बोलावूं काय ?
८ फारोच्या कन्येनें तिला म्हटलें, जा बोलाव. तेव्हां
ती मुलगी जाऊन त्या बालकाच्या आईस घेऊन आली.
९ फारोच्या कन्येनें तिला म्हटलें, या मुलास घेऊन जा,
आणि मजकरितां यास दूध पाज, म्हणजे मी तुला वेतन
देईन. मग ती स्त्री त्याला घेऊन जाऊन दूध पाजूं
लागली. १० तें मूल वाढून मोठें झालें तेव्हां ती त्यास
घेऊन फारोच्या कन्येकडे गेली, आणि तो तिचा पुत्र
झाला. तिनें त्याचें नांव मोशे ठेविलें, कारण ती
म्हणाली, मीं त्याला पाण्यांतून काढिलें.

११ कांहीं दिवसांनीं असें झालें कीं मोशे मोठा
झाल्यावर त्यानें आपल्या भाऊबंदांकडे जाऊन त्यांचे
कामाडकष्ट पाहिले; त्या प्रसंगीं आपल्या भाऊबंदांपैकीं
एका इब्र्याला कोणी मिसरी मारीत असतांना त्यानें
पाहिलें. १२ तेव्हां त्यानें इकडेतिकडे सभोवार नजर
फेकली व कोणी नाहीं असें पाहून त्या मिसऱ्यास ठार
करून त्याला वाळूंत पुरून गारद केलें. १३ तो पुन्हां दुसऱ्या
दिवशीं बाहेर गेला तों दोघां इब्री मनुष्यांस एकमेकांशीं
मारामारी करतांना त्यानें पाहिलें; तेव्हां ज्याची
आगळीक होती त्यास म्हणाला, तूं आपल्या
बांधवाला कां मारीत आहेस ? १४ तो त्यास
म्हणाला, तुला आम्हांवर अधिकारी व न्यायाधीश कोणीं
नेमिलें ? तूं त्या मिसऱ्यास जिवें मारिलें तसें मलाहि
मारावयास पाहतोस काय ? तेव्हां मोशाला भीति पडली;
तो म्हणाला, खरोखर ती गोष्ट फुटली असावी.
१५ फारोच्या कानीं ती गोष्ट गेली तेव्हां मोशाला
मारून टाकण्याचें त्यानें योजिलें; पण मोशे फारोपुढून
पळून मिद्यान देशांत जाऊन पोहंचला आणि तेथें एका
विहिरीपाशीं बसला.

१६ तेथील मिद्यानी याजकाला सात कन्या होत्या; त्या
येऊन पाणी काढून आपल्या बापाच्या शेरडांमेंढरांस पाजण्या-
करितां तें डोणींत भरीत होत्या. १७ इतक्यांत धन-
गरांनीं येऊन त्यांस हाकून लाविलें; तेव्हां मोशानें उठून
त्या मुलींस मदत करून त्यांच्या कळपास पाणी पाजिलें.
१८ त्या आपला बाप रगुवेल याजकडे आल्या तेव्हां तो
म्हणाला, आज तुम्ही लवकर कशा आलां ? १९ त्या
म्हणाल्या, धनगरांच्या हातून एका मिसरी मनुष्यानें आमची
सुटका केली, आणि आम्हांसाठीं पाणी देखील काढून
कळपास पाजिलें. २० तो आपल्या कन्यांस म्हणाला,
तो कोठें आहे ? त्याला तेथें सोडून तुम्ही कां आलां ?
त्याला जेवावयास बोलावून आणा. २१ मोशे त्या
मनुष्यापाशीं राहण्यास कबूल झाला; त्यानें मोशाला
आपली कन्या सिप्पोरा दिली. २२ तिला पुत्र झाला,
त्यानें त्याचें नांव गेर्षोम ठेविलें; तो म्हणाला, कारण
मी परदेशांत वस्ती करून आहें.

२३ बराच काळ लोटल्यावर मिसराचा राजा मृत्यु
पावला; इकडे इस्राएलवंशज बिकट दास्यामुळें उसासे
टाकून आकांत करीत, आणि त्या दास्यामुळें त्यांनीं
केलेला आकांत वर देवापर्यंत जाऊन पोहंचला.
२४ देवानें त्यांचा आकांत ऐकला तेव्हां अब्राहाम,
इसहाक व याकोब यांच्याशीं केलेल्या करारांचें त्यास
स्मरण झालें, २५ म्हणून देवानें इस्राएलवंशजांकडे
दृष्टि दिली; देवानें त्यांच्याकडे लक्ष पुरविलें.

३ १ मोशे आपला सासरा मिद्यानी याजक इथ्रो
याचीं शेरडेंमेंढरें चारीत असे; एके दिवशीं
तो आपला कळप रानाच्या पिछाडीस देवाचा डोंगर
होरेब येथवर घेऊन गेला. २ तेव्हां परमेश्वराच्या
दूतानें एका झुडपांतून अग्निज्वालेच्या द्वारें त्यास
दर्शन दिलें; त्यानें दृष्टि लाविली तों झुडूप अग्नीनें
जळत असून तें भस्म झालें नाहीं असें त्यास दिसलें.
३ तेव्हां मोशे म्हणाला, मी आतां तिकडे जाऊन हा
काय चमत्कार आहे, तें झुडूप कां भस्म होत नाहीं, तें
पाहतों. ४ तें पाहण्यास मोशे तिकडे वळला असें
परमेश्वरानें पाहिलें; आणि झुडपांतून देवानें त्यास

हाक मारून म्हटलें, मोशे, मोशे. तेव्हां तो म्हणाला,
काय आज्ञा? ५ देव त्यास म्हणाला, इकडे जवळ येऊं
नको; तूं आपल्या पायांतले जोडे काढ, कारण ज्या
जागीं तूं उभा आहेस ती भूमि पवित्र आहे. ६ तो
आणखी म्हणाला, मी तुझ्या पित्याचा देव, अब्राहामाचा
देव, इसहाकाचा देव, याकोबाचा देव आहें. तेव्हां
मोशानें आपलें मुख झाकिलें; कारण देवाकडे दृष्टि
करण्यास तो धजला नाहीं. ७ परमेश्वर म्हणाला,
मिसर देशांत असलेल्या माझ्या लोकांची विपत्ति
मीं खरोखर पाहिली आहे; त्यांजपासून बिगारकाम
घेणाऱ्या मुकादमांच्या त्रासामुळें त्यांनीं केलेला
आकांत मीं ऐकला आहे; त्यांचे क्लेश मी जाणून
आहें; ८ त्यांस मिसऱ्यांच्या हातांतून सोडवावें, आणि
चांगल्या विस्तृत देशांत, दुधामधाचे प्रवाह ज्यांत
वाहत आहेत अशा देशांत, म्हणजे कनानी, हित्ती,
अमोरी, परिज्जी, हिव्वी व यबूसी यांच्या देशांत
त्यांस घेऊन जावें म्हणून मी उतरलों आहें.
९ पाहा, इस्राएलवंशजांचा आकांत मजपर्यंत आला
आहे; मिसरी लोक त्यांजवर कसा जाचजुलूम करीत
आहेत हेंहि मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे. १० तर
आतां चल, तूं मिसर देशांतून माझे लोक इस्राएल-
वंशज यांस बाहेर काढावें म्हणून मी तुला फारोकडे
पाठवितों. ११ तेव्हां मोशे देवाला म्हणाला, फारोकडे
जाऊन इस्राएल लोकांस मिसरांतून काढून आणणारा
असा मी कोण? १२ देव म्हणाला, निःसंशय मी तुज-
बरोबर असेन; मीं तुला पाठविलें याची तुला हीच खूण
कीं तूं लोकांस मिसरांतून काढून आणिल्यावर याच
डोंगरावर तुम्ही देवाची उपासना कराल.

१३ तेव्हां मोशे देवाला म्हणाला, पाहा, मला तुमच्या
पूर्वजांच्या देवानें तुम्हांकडे पाठविलें आहे, असें मीं
इस्राएल लोकांकडे जाऊन त्यांस सांगितलें असतां त्याचें
नाम काय असें मला ते विचारतील तेव्हां मी काय
सांगूं? १४ देव मोशाला म्हणाला, मी[१] जो असाव-
याचा तोच असणार; तूं इस्राएल लोकांस सांग 'मी
असणार' यानें मला तुम्हांकडे पाठविलें आहे.
१५ आणखी देवानें मोशाला सांगितलें, तूं इस्राएल
लोकांस सांग, तुमच्या पूर्वजांचा देव, अब्राहामाचा
देव, इसहाकाचा देव व याकोबाचा देव परमेश्वर
यानें मला तुम्हांकडे पाठविलें आहे; हेंच माझें सना-
तन नाम आहे व याच नामानें पिढ्यानपिढ्या माझें
स्मरण होईल. १६ तूं जा आणि इस्राएलाच्या वडील
जनांस जमवून सांग: तुमच्या पूर्वजांचा देव,
अब्राहामाचा, इसहाकाचा व याकोबाचा देव पर-
मेश्वर यानें मला दर्शन देऊन म्हटलें कीं माझें
तुम्हांकडे खरोखर लक्ष गेलें आहे व मिसर देशांत
तुमचें काय होत आहे हें मला कळलें आहे;
१७ मिसर देशांतल्या विपत्तींतून मी तुमची सोड-
वणूक करून कनानी, हित्ती, अमोरी, परिज्जी, हिव्वी
व यबूसी यांच्या देशांत, ज्यांतून दुधामधाचे प्रवाह
वाहत आहेत त्या देशांत, तुम्हांस घेऊन जाईन असें
मीं सांगितलें आहे म्हणून कळीव. १८ तुझें सांगणें ते
ऐकतील; मग तूं आणि इस्राएलांचे वडील जन मिसर
देशाच्या राजाकडे जा व त्यास सांगा, इब्र्यांचा देव
परमेश्वर आम्हांस भेटला आहे; तर आमचा देव
परमेश्वर याला होमबलि अर्पावे म्हणून आम्हांस तीन
दिवसांच्या वाटेवर रानांत जाऊं द्यावें असा आमचा
अर्ज आहे; १९ पण मला ठाऊक आहे कीं मिसर
देशाचा राजा तुम्हांस जाऊं देणार नाहीं; त्यास भुज-
प्रताप दाखविला तरी तो जाऊं देणार नाहीं. २० मग
मी आपला हात दाखवून मिसर देशांत ज्या सर्व
अद्भुत कृति करणार त्यांचा मारा मी त्यांजवर
करीन; मग तो तुम्हांस जाऊं देईल; २१ आणि या
लोकांवर मिसरी लोकांची कृपादृष्टि होईल असें मी
करीन; म्हणून तुम्ही निघाल तेव्हां रिक्तहस्तें निघणार
नाहीं; २२ तर तुमची प्रत्येक स्त्री आपल्या शेजारणी-
पासून व आपल्या घरांत बिऱ्हाड करून राह-
णाऱ्या स्त्रीपासून सोन्यारुप्याचे अलंकार व पोषाख
मागून घेईल; ते तुम्ही आपले पुत्र व कन्या यांस

[१] अथवा: मी जो आहें तोच आहें.

घालाल, या प्रकारें तुम्ही मिसरी लोकांस लुटाल.
१ तेव्हां मोशानें उत्तर केलें, पण ते माझा
४ विश्वास धरणार नाहींत व माझें म्हणणें ऐकणार
नाहींत; ते म्हणतील, परमेश्वरानें तुला दर्शन दिलेंच
नाहीं. २ तेव्हां परमेश्वर त्याला म्हणाला, तुझ्या हातीं
तें काय आहे? तो म्हणाला, काठी आहे. ३ त्यानें
म्हटलें, ती जमिनीवर टाक. ती त्यानें टाकितांच तिचा
साप झाला; त्यास पाहून मोशे पळाला. ४ परमेश्वरानें
मोशास सांगितलें, आपला हात पुढें करून त्याचें शेपूट
धर; (त्यानें हात पुढें करून तें धरिलें, तों त्या
सापाची त्याच्या हातांत काठी झाली;) ५ म्हणजे
त्यांच्या पूर्वजांचा देव, अब्राहामाचा देव, इसहाकाचा
देव व याकोबाचा देव परमेश्वर याचें तुला दर्शन झालें
हें यावरून त्यांस पटेल. ६ परमेश्वरानें त्यास आणखी
सांगितलें, आतां आपला हात आपल्या उरावर ठेव.
त्यानें हात उरावर ठेवून काढिला तों तो कोडानें
बर्फासारखा पांढरा झाला. ७ मग त्यानें त्यास
सांगितलें, पुनः आपला हात उरावर ठेव. (तेव्हां
त्यानें पुनः उरावर हात ठेविला; आणि उरावरून
काढिला तों त्याच्या शरीराच्या इतर भागांप्रमाणें तो
पूर्ववत् झाला.) ८ ते तुझा विश्वास न धरून पहिल्या
चिन्हाची सूचना मानणार नाहींत तर ते या दुसऱ्या
चिन्हाची सूचना खरी मानितील; ९ पण जर ते या
दोन्ही चिन्हांस मानणार नाहींत व तुझें ऐकणार
नाहींत, तर तूं नदीचें पाणी घेऊन कोरड्या जमिनीवर
ओत, म्हणजे तूं नदींतून घेतलेल्या पाण्याचें कोरड्या
भूमीवर रक्त होईल.
१० तेव्हां मोशे परमेश्वरास म्हणाला, हे प्रभू, मी
वक्ता नव्हे; पूर्वींहि नव्हतों, व तूं आपल्या दासापाशीं
बोललास तेव्हांपासूनहि नाहीं; मी तर मुखाचा जड व
जिव्हेचाहि जड आहें. ११ तेव्हां परमेश्वर त्यास म्हणाला,
मनुष्याचें तोंड कोणीं केलें आहे? मनुष्यास मुका, बहिरा,
डोळस किंवा आंधळा कोण करितो? मी परमेश्वरच कीं
नाहीं? १२ तर आतां जा, मी तुझ्या मुखास साहाय्य
होईन आणि तूं काय बोलावें तें तुला शिकवीन. १३ तेव्हां
तो म्हणाला, हे प्रभू, तुझ्या मर्जीस येईल त्याच्या हस्तें
त्यांस संदेश पाठीव. १४ मग मोशावर परमेश्वराचा
राग भडकला, व तो त्यास म्हणाला, लेवी अहरोन हा
तुझा भाऊ नव्हे काय? त्याला चांगलें बोलतां येतें हें
मला ठाऊक आहे. तो पाहा, तुला भेटावयास येत
आहे; तुला पाहून तो आपल्या मनांत संतोष पावेल.
१५ तूं त्याजशीं बोलून त्याच्या मुखांत शब्द घाल; मी
त्याच्या व तुझ्या मुखांस साहाय्य होईन, आणि तुम्हीं
काय करावें हें तुम्हांस शिकवीन. १६ तो तुझ्या तर्फे
लोकांशीं बोलेल; तो तुझें मुख होईल आणि तूं त्याला
देवाच्या ठिकाणीं होशील. १७ तूं आपल्या हातीं ही
काठी घे; हिनें तूं चिन्हें दाखविशील.
१८ मग मोशे तेथून निघून आपला सासरा इथ्रो
याजकडे गेला व त्याला म्हणाला, मला मिसरांतल्या
माझ्या भाऊबंदांकडे परत जाऊं द्यावें; ते अजून
जिवंत आहेत किंवा नाहींत तें मला पाहूं द्यावें. तेव्हां
इथ्रो मोशाला म्हणाला, सुखानें जा. १९ मिद्यान
प्रांतांत परमेश्वर मोशाला म्हणाला, चल, मिसर देशांत
परत जा; तुझा जीव घेऊं पाहणारे सगळे मृत्यु पावले
आहेत. २० मग मोशे आपली बायको व पुत्र यांस
गाढवावर बसवून मिसर देशास माघारीं जावयास
निघाला. तो देवाची काठी आपल्या हातीं घेऊन
चालला; २१ परमेश्वर मोशाला म्हणाला, तूं मिसरास
परत गेलास म्हणजे ज्या अद्भुत कृति तुझ्या हातीं
ठेविल्या आहेत त्या सर्व फारोपुढें करून दाखीव बरें; तरी
मी त्याचें मन कठीण करीन आणि तो माझ्या लोकांस
जाऊं देणार नाहीं. २२ तूं जाऊन फारोस सांग,
परमेश्वर म्हणतो, इस्राएल हा माझा पुत्र, माझा ज्येष्ठ
पुत्र आहे; २३ मीं तुला सांगितलें कीं माझ्या पुत्रास
माझी उपासना करण्यास जाऊं दे; पण तूं त्यास जाऊं
देण्याचें नाकारिलें; तर पाहा, मी तुझा पुत्र, तुझा ज्येष्ठ
पुत्र जिवें मारीन. २४ मग प्रवास करीत असतां
उतारशाळेंत असें झालें कीं परमेश्वरानें त्याला गांठून
जिवें मारावयास पाहिलें. २५ तों सिप्पोरा हिनें एक
धारेची गारगोटी घेऊन आपल्या पुत्राची अग्रत्वचा

कापिली आणि ती मोशाच्या पायांपाशीं ठेवून ती
म्हणाली, तूं रक्तानें मिळविलेला माझा नवरा आहेस.
२६ तेव्हां परमेश्वरानें मोशाला पीडण्याचें सोडिलें.
रक्तानें मिळविलेला नवरा असें तिनें सुंतेला
अनुलक्षून म्हटलें.

२७ मग परमेश्वर अहरोनास म्हणाला, मोशाला
भेटावयास तूं रानांत जा. तो गेला आणि देवाच्या
डोंगरावर त्याला भेटून त्यानें त्याचें चुंबन घेतलें.
२८ मग परमेश्वरानें त्याला ज्या आज्ञा देऊन पाठविलें
व जीं चिन्हें दाखविण्याची आज्ञा केली तीं सर्व मोशानें
अहरोनास सांगितलीं. २९ नंतर मोशे व अहरोन
यांनीं जाऊन इस्राएलवंशाचे सर्व वडील जन जमविले;
३० आणि परमेश्वरानें मोशास जें कांहीं सांगितलें
होतें तें सर्व अहरोनानें लोकांस कळविलें आणि
त्यांस चिन्हें करून दाखविलीं. ३१ तेव्हां
लोकांना विश्वास आला; परमेश्वरानें इस्राएल
घराण्याची भेट घेऊन त्यांच्या विपत्तीकडे लक्ष
पुरविलें हें त्यांनीं ऐकलें तेव्हां त्यांनीं नमन
करून त्याची आराधना केली.

१ नंतर मोशे व अहरोन फारोकडे जाऊन
५ म्हणाले, इस्राएलाचा देव परमेश्वर सांगत आहे कीं
माझ्या लोकांनीं माझ्याप्रीत्यर्थ रानांत उत्सव[1]
करावा म्हणून त्यांस जाऊं दे. २ तेव्हां फारो
म्हणाला, हा कोण परमेश्वर कीं ज्याचें ऐकून
मीं इस्राएलास जाऊं द्यावें? मी त्या परमेश्वराला
जाणत नाहीं, आणि इस्राएलास कांहीं जाऊं देणार
नाहीं. ३ ते म्हणाले, इब्र्यांच्या देवानें आम्हांस भेट
दिली; तर आतां आम्हांस तीन दिवसांच्या वाटेवर
रानांत जाऊं द्यावें आणि आमचा देव परमेश्वर यास
यज्ञबलि अर्पूं द्यावा असा आमचा अर्ज आहे; असें
न केल्यास तो कदाचित् पटकीनें अथवा तर-
वारीनें आमचा समाचार घेईल. ४ मिसराचा राजा
त्यास म्हणाला; हे मोशे, हे अहरोना, तुम्ही लोकांस
काम सोडून जावयास कां लावितां? तुम्ही आपल्या
बिगारकामावर चालते व्हा. ५ फारो आणखी म्हणाला,
पाहा, हे बिगारी लोक देशांत बहुत आहेत, आणि
तुम्ही त्यांना काम सोडून जावयास लावणार. ६ त्याच
दिवशीं फारोनें त्या लोकांचे मुकादम व त्यांचे नायक
यांस आज्ञा केली कीं, ७ विटा करण्यासाठीं तुम्ही या
लोकांस आजवर गवत देत आलां तसें आतां देऊं नका;
त्यांनीं स्वतः जाऊन गवत मिळवावें. ८ तरी जेवढ्या विटा
त्यांस कराव्या लागतात तेवढ्या त्यांजकडून करवा, कांहीं
कमी करूं नका; ते आळशी बनले आहेत, म्हणून ते
ओरड करीत आहेत कीं आम्हांस जाऊं द्या, आमच्या
देवास यज्ञबलि अर्पूं द्या. ९ या लोकांवर अधिक काम
लादा, म्हणजे त्यांजवर कामाचा बोजा पडून ते या खोट्या
बोलण्यावर विश्वास ठेवणार नाहींत.

१० मग लोकांचे मुकादम व नायक बाहेर
जाऊन त्यांस म्हणाले, फारो म्हणतो, मी तुम्हांस
गवत पुरविणार नाहीं. ११ तुम्हीच जा आणि
मिळेल तेथून गवत आणा; तुमचें काम कांहीं
कमी होणार नाहीं. १२ तेव्हां ते लोक गवताच्या
ऐवजीं धान्याचे सड जमा करण्यास सर्व मिसर
देशभर पांगले. १३ त्यांच्यामागें मुकादमांचा असा
तगादा असे कीं तुम्हांस गवत पुरविण्यांत येत होतें
तेव्हांच्या इतकें तुमचें रोजचें काम पुरें करा.
१४ इस्राएल लोकांवर त्यांच्यापैकीं जे नायक नेमले
होते त्यांस फारोच्या मुकादमांनीं मार देऊन विचारिलें
कीं तुम्ही नेहमीं विटा करितां तेवढी संख्या अलीकडे
कां पुरी करीत नाहीं? १५ तेव्हां इस्राएल लोकांचे
नायक फारोकडे जाऊन ओरड करून म्हणाले, आपण
आपल्या दासांशीं असें कां वर्ततां? १६ आपल्या
दासांस गवत देत नाहींत तरी ते आम्हांस म्हणतात, विटा
करा; पाहा, आपल्या दासांस मार मिळत आहे; पण दोष
सारा आपल्या लोकांचा आहे. १७ तो म्हणाला,
तुम्ही आळशी आहां आळशी; म्हणूनच तुम्ही
म्हणतां, आम्हांला जाऊं द्यावें, आमच्या परमेश्वरा-
प्रीत्यर्थ आम्हांला यज्ञ करूं द्यावा. १८ निघा येथून,

१ मूळ शब्दाचा अर्थ हाज किंवा यात्रा.

आणि आपलें काम करा; तुम्हांला गवत कांहीं
मिळावयाचें नाहीं, आणि विटा तर नेहमींच्या
इतक्याच करून दिल्या पाहिजेत; १९ विटा व
रोजचें काम यांत तुम्हीं कांहीं कमी करितां कामा
नये; हें असें इस्राएलांच्या नायकांस बजाविण्यांत
आलें तेव्हां आपण फार पेचांत आहों असें त्यांच्या
लक्षांत आलें; २० फारोकडून निघाल्यावर त्यांस
वाटेंत मोशे व अहरोन भेटले; २१ तेव्हां ते त्यांस
म्हणाले, परमेश्वर तुम्हांला पाहून घेवो, फारोच्या व
त्याच्या चाकरांच्या दृष्टीनें तुम्हीं आम्हास किळसवाणे
केलें आहे; आम्हांस मारून टाकण्यासाठीं तुम्हीं
त्यांच्या हातांत जशी काय तरवारच दिली आहे.
२२ मग मोशे परमेश्वराकडे परत जाऊन म्हणाला,
प्रभू, तूं या लोकांस कां पीडिलें आहे ? मला तूं
त्यांजकडे पाठविलें तें काय म्हणून ? २३ मी तुझ्या
नामानें बोलण्यासाठीं फारोकडे आलों तेव्हांपासून
तो या लोकांस पीडीत आहे; तूं आपल्या
लोकांची सोडवणूक तर मुळींच केली नाहीं.

६ १ मग परमेश्वर मोशाला म्हणाला, मी आतां
फारोला काय करितों तें तूं पाहशील; मीं त्याला
भुजप्रताप दाखविला म्हणजे तो या लोकांस जाऊं
देईल, माझा भुजप्रताप त्याला दाखविला म्हणजे तो
यांस आपल्या देशांतून बाहेर घालवून देईल.
२ देव मोशाला म्हणाला, मी परमेश्वर आहें. ३ मी
अब्राहाम, इसहाक व याकोब यांस सर्वसमर्थ[1] देव
म्हणून प्रगट झालों तथापि परमेश्वर[2] या माझ्या नामानें
मी त्यांस ज्ञात नव्हतों. ४ ज्या कनान देशांत ते
उपरी होते तो परदेश त्यांस वतन देण्याविषयींचा
करार मीं त्यांजशीं केला आहे; ५ शिवाय ज्या इस्राएल
लोकांस मिसऱ्यांनीं दास करून ठेविलें आहे, त्यांचा
आक्रोश ऐकून मीं आपल्या करारांचें स्मरण केलें
आहे. ६ म्हणून इस्राएल लोकांस सांग, मी परमेश्वर
आहें; मी तुम्हांस मिसऱ्यांच्या बिगारींतून काढीन,
त्यांच्या दास्यांतून तुम्हांस मुक्त करीन आणि बाहु लांब
करून व भारी शासन देऊन तुमचा उद्धार करीन;
७ मी तुम्हांस आपली प्रजा करून घेईन आणि मी
तुमचा देव होईन; म्हणजे तुम्हांस मिसऱ्यांच्या बिगारींतून
काढणारा मी तुमचा देव परमेश्वर आहें हें तुम्हांस
कळेल. ८ आणि जो देश अब्राहाम, इसहाक व
याकोब यांस देण्याची शपथ बाहु उभे करून मीं वाहिली
होती त्यांत मी तुम्हांस नेईन आणि तो तुम्हांस वतन
करून देईन; मी परमेश्वर आहें. ९ मोशानें हें सारें
इस्राएल लोकांस सांगितलें; पण ते आपल्या मनाच्या
संतापामुळें आणि बिकट दास्यामुळें मोशाचें ऐकेनात.

१० मग परमेश्वर मोशाला म्हणाला, ११ तूं जाऊन
मिसराचा राजा फारो याला सांग कीं इस्राएल लोकांस
तुझ्या देशांतून निघून जाऊं दे. १२ तेव्हां मोशे
परमेश्वरासमोर म्हणाला, पाहा, इस्राएल लोकांनीं माझें
ऐकलें नाहीं, तर फारो माझें कसें ऐकेल ? माझें मुख
तर बेसुनत (संस्कारविरहित) आहे. १३ या प्रकारें
परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस मिसर देशांतून
इस्राएल लोकांस बाहेर नेण्याविषयीं आज्ञा देऊन
इस्राएल लोकांकडे आणि मिसरी राजा फारो
याजकडे पाठविलें.

१४ मोशे व अहरोन यांच्या पूर्वजांपैकीं प्रमुख
पुरुष हे : इस्राएलाचा ज्येष्ठ पुत्र रऊबेन याचे पुत्र
हानोख, पल्लू, हेस्रोन व कर्मी; हीं रऊबेनाचीं कुळें.
१५ शिमोनाचे पुत्र : यमुवेल, यामीन, ओहद,
याखीन, जोहर व कनानी स्त्रीपासून झालेला शौल; हीं
शिमोनाचीं कुळें. १६ लेवीच्या वंशावळीप्रमाणें त्याच्या
पुत्रांचीं नांवें हीं : गेर्षोन, कहाथ व मरारी; लेवीच्या
आयुष्याची वर्षसंख्या एकशेंसदतीस होती. १७ गेर्षो-
नाच्या कुळाप्रमाणें त्याचे पुत्र : लिब्नी व शिमी.
१८ कहाथाचे पुत्र : अम्राम, इसहार, हेब्रोन व
उज्जियेल; कहाथाच्या आयुष्याची वर्षसंख्या एकशें-
तेहतीस होती. १९ मरारीचे पुत्र : महली व मूशी.
लेवीच्या वंशावळीप्रमाणें हीं त्यांचीं कुळें. २० अम्रा-
मानें आपली आत योखबेद ही बायको केली;

---

१ मुळांत : एल्-शाद्दाय. २ मुळांत : याव्हे.

तिच्यापासून त्याला अहरोन व मोशे झाले; अम्रामाच्या आयुष्याची वर्षसंख्या एकशेंसदतीस होती. २१ इसहाराचे पुत्र: कोरह, नेफेग व जिख्री. २२ उज्जियेलाचे पुत्र: मिशाएल, एलसाफान व सिथ्री. २३ अहरोनानें अम्मीनादाबाची कन्या नहशोनाची बहीण अलीशेबा बायको केली; तिच्यापासून त्याला नादाब, अबीहू, एलाजार व इथामार हे झाले. २४ कोरहाचे पुत्र: अस्सीर, एल्काना व अबीयासाफ; हीं कोरहाचीं कुळें. २५ अहरोनाचा पुत्र एलाजार यानें पुटियेलाच्या कन्यांपैकीं एक बायको केली; तिच्यापासून त्याला फिनहास झाला. त्यांच्या त्यांच्या घराण्यांप्रमाणें लेवीच्या पितृकुलांतील प्रमुख पुरुष हेच. २६ इस्राएल लोकांचीं दळें करून मिसर देशांतून बाहेर घेऊन जा अशी परमेश्वरानें ज्यांस आज्ञा केली तेच हे अहरोन व मोशे. २७ इस्राएल लोकांस मिसरांतून आम्ही घेऊन जाणार असें मिसरी राजा फारो याजपाशीं जे बोलले तेच हे मोशे व अहरोन.

२८ मग मिसर देशीं परमेश्वरानें मोशाबरोबर भाषण केलें, त्या दिवशीं २९ परमेश्वर मोशाला म्हणाला, मी परमेश्वर आहें, मी तुला सांगतों तें सर्व मिसरी राजा फारो याला सांग. ३० तेव्हां मोशे परमेश्वरास म्हणाला, पाहा, मी बेसुनत (संस्कारविरहित) मुखाचा आहें, तर फारो माझें कसें ऐकणार? १ त्या समयीं परमेश्वरानें मोशाला म्हटलें,

७ पाहा, तुला मी फारोचा देवच करितों; आणि तुझा भाऊ अहरोन हा तुझा संदेष्टा होईल. २ जी कांहीं आज्ञा मी तुला करीन ती अहरोनास कळीव व त्यानें फारोस सांगावें कीं तूं इस्राएल लोकांस तुझ्या देशांतून निघून जाऊं दे. ३ मी फारोचें मन कठोर करीन आणि मिसर देशांत माझीं चिन्हें व अद्भुतें विपुल दाखवीन. ४ तरी फारो तुमचें कांहीं ऐकणार नाहीं, मग मी मिसरावर आपला हात चालवीन आणि त्यास मोठीं शासनें करून आपली सेना इस्राएल लोक यांस मिसर देशांतून घेऊन जाईन. ५ आणि मिसरावर मी हात उगारून त्यांच्यांतून इस्राएल लोकांस घेऊन जाईन तेव्हां मिसऱ्यांस कळेल कीं मी परमेश्वर आहें. ६ मोशे व अहरोन यांनीं तसें केलें; परमेश्वरानें त्यांस आज्ञा केली त्याप्रमाणें त्यांनीं केलें. ७ मोशे व अहरोन यांनीं फारोशीं हें बोलणें केलें तेव्हां मोशे ऐंशीं वर्षांचा व अहरोन त्र्याऐंशीं वर्षांचा होता.

८ नंतर परमेश्वर मोशे व अहरोन यांस म्हणाला, ९ तुम्ही स्वतः कांहीं अद्भुत कृति दाखवा असें फारो तुम्हांस म्हणेल तेव्हां तूं अहरोनास सांग, आपली काठी घेऊन फारोपुढें टाक म्हणजे तिचा सर्प होईल. १० मग मोशे व अहरोन यांनीं फारोजवळ जाऊन परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें केलें; अहरोनानें आपली काठी फारो व त्याचे सेवक यांच्यापुढें टाकिली तेव्हां तिचा सर्प झाला. ११ हें पाहून फारोनें जाणते व मांत्रिक यांस बोलाविलें; त्या मिसरी जादुगिरांनींसुद्धां आपल्या मंत्रतंत्रांच्यायोगें तसाच प्रकार केला. १२ त्यांनीहि आपआपल्या काठ्या खालीं टाकितांच त्यांचे सर्प झाले; पण अहरोनाच्या काठीनें त्यांच्या काठ्या गिळून टाकिल्या. १३ तथापि फारोचें मन कठीण झालें, आणि परमेश्वरानें म्हटलें होतें त्याप्रमाणें तो मोशे व अहरोन यांचें म्हणणें ऐकेना.

१४ तेव्हां परमेश्वरानें मोशास म्हटलें फारोचें मन कठीण आहे, तो या लोकांस जाऊं देत नाहीं. १५ सकाळीं फारोकडे जा; पाहा, तो नदीकडे जाईल तेव्हां ज्या काठीचा सर्प बनला होता ती हातीं घेऊन नील नदीच्या तीरीं त्याच्या भेटीस उभा राहा. १६ त्यास असें सांग कीं इब्र्यांचा देव परमेश्वर यानें माझ्या हातीं तुला हा निरोप सांगितला आहे कीं माझ्या लोकांस जाऊं दे म्हणजे ते रानांत माझी उपासना करितील; पण तूं अजून ऐकत नाहींस. १७ परमेश्वर म्हणतो कीं, मी परमेश्वर आहें हें तुला यावरून कळेल; पाहा, मी आपल्या हातांतली काठी नदीच्या पाण्यावर मारीन तेव्हां त्या पाण्याचें रक्त होईल. १८ नदींतील मासे मरतील आणि तिला घाण सुटेल; आणि तिचें पाणी पिण्याची मिसरी

लोकांस किळस वाटेल. १९ मग परमेश्वरानें
मोशाला म्हटलें, तूं अहरोनास सांग कीं आपली काठी
घेऊन मिसर देशांत जितकें पाणी म्हणून आहे
म्हणजे त्यांतल्या नद्या, नाले, तलाव व हौद या
सर्वांवर आपला हात उगार म्हणजे त्या सर्वांचें रक्त
बनेल; आणि मिसरांतील काष्ठपाषाणांच्या सर्व पात्रांतून
रक्तच रक्त होईल.
२० तेव्हां मोशे व अहरोन यांनीं परमेश्वराच्या
आज्ञेप्रमाणें केलें; त्यानें काठी उचलून फारोच्या व
त्याच्या सेवकांच्या समक्ष पाण्यावर मारिली तेव्हां नदींतील
सर्व पाण्याचें रक्त बनलें. २१ नदींतील मासे मेले, तीतून
घाण सुटली आणि मिसरी लोकांस नदींतील पाणी पिव-
वेना; साऱ्या मिसर देशांत रक्तच रक्त झालें. २२ तेव्हां
मिसरी जादुगिरांनीं आपल्या मंत्रतंत्रानें तसाच प्रकार
केला, तेव्हां फारोचें मन कठीण झालें आणि त्यानें
मोशे व अहरोन यांचें ऐकलें नाहीं; परमेश्वरानें
मोशाला असें सांगितलेंच होतें. २३ फारो तेथून मागें
फिरून आपल्या घरीं चालता झाला; हें सुद्धां त्यानें
लक्षांत घेतलें नाहीं. २४ सर्व मिसरी लोकांनीं
पिण्याच्या पाण्यासाठीं नदीच्या आसपास झिरे खणिले;
कारण नदीचें पाणी त्यांस पिववेना. २५ परमेश्वरानें
नदीस ताडण केल्यास सात दिवस लोटले.
१ नंतर परमेश्वर मोशास म्हणाला, फारोकडे
८ जाऊन त्यास सांग, परमेश्वर असें म्हणतो कीं
माझ्या लोकांनीं माझी उपासना करावी म्हणून
त्यांस जाऊं दे. २ तूं त्यांस जाऊं देणार नाहींस तर
पाहा, मी बेडकांनीं तुझ्या अवघ्या देशाला पीडीन;
३ नील नदींत बेडकांचा सुळसुळाट होईल आणि
तुझ्या मंदिरांत, तुझ्या शय्यागृहांत, तुझ्या अंथरुणा-
वर, तुझ्या चाकरनौकरांच्या घरांत, तुझ्या प्रजाजनां-
वर, तुझ्या भट्यांत आणि काथवटींत बेडूकच बेडूक
होतील; ४ तुझ्या व तुझ्या लोकांच्या, आणि तुझ्या
सर्व सेवकांच्या अंगावर बेडूक चढतील. ५ परमेश्वर
मोशाला म्हणाला, अहरोनाला सांग कीं आपली काठी
हातीं घेऊन नद्या, नाले व तलाव यांवर आपला
हात उगार आणि बेडूक मिसर देशावर चढून येतील
असें कर. ६ अहरोनानें मिसरांतील जलाशयांवर
आपला हात उगारिला तेव्हां बेडूक बाहेर निघाले,
आणि त्यांनीं मिसर देश व्यापून टाकिला.
७ जादुगिरांनींहि आपल्या मंत्रतंत्रानें तसेंच केलें,
त्यांनीं मिसर देशावर बेडूक आणिले.
८ मग फारोनें मोशे व अहरोन यांस बोलावून आणून
म्हटलें, परमेश्वरापाशीं विनंति करा कीं माझ्यापासून व
माझ्या प्रजेपासून त्यानें हे बेडूक दूर करावे, म्हणजे पर-
मेश्वराप्रीत्यर्थ यज्ञ करावयासाठीं मी तुमच्या लोकांस जाऊं
देईन. ९ मोशे फारोस म्हणाला, तुझ्यापासून व तुझ्या
घरांतून बेडूक नाहींतसे करून नदींत मात्र राहूं द्यावे
म्हणून मीं तुजसाठीं, तुझ्या सेवकांसाठीं आणि तुझ्या
प्रजेसाठीं कोणत्या समयीं आराधना करावी हें सांग-
ण्याचा मान माझ्याऐवजीं तुला असो. १० तो
म्हणाला, उद्यां; तेव्हां त्यानें म्हटलें, तुझ्या आज्ञेप्रमाणें
होईल; म्हणजे तुला कळेल कीं आमचा देव परमेश्वर
यासारखा अन्य कोणी नाहीं. ११ बेडूक तुजपासून,
तुझ्या घरांतून, तुझ्या सेवकांपासून, तुझ्या प्रजेपासून
दूर होतील; ते फक्त नदींत राहतील. १२ मोशे
आणि अहरोन हे फारोपासून निघाले; आणि परमेश्वरानें
फारोवर बेडूक आणिले होते त्यांसंबंधानें मोशानें
परमेश्वराची आराधना केली. १३ परमेश्वरानें मोशाच्या
विनंतीप्रमाणें केलें; घरींदारीं, अंगणांत, व शेतांत
बेडूक होते ते सर्व मरून गेले. १४ लोकांनीं
ते गोळा करून त्यांचे ढीग केले, तेव्हां सर्व
जमिनीवर घाण सुटली. १५ हा असा दम घेण्यास
अवकाश मिळाला हें पाहून फारोनें आपलें मन
कठीण केलें आणि त्यांचें ऐकलें नाहीं; परमेश्वरानें
असें सांगितलेंच होतें.
१६ मग परमेश्वरानें मोशाला म्हटलें, अहरोनाला
सांग कीं आपली काठी उगारून जमिनीच्या धुळीवर
मार म्हणजे मिसर देशभर त्या धुळीच्या उवा बनतील.
१७ त्यांनीं तसें केलें; अहरोनानें आपल्या हातांतली
काठी उगारून जमिनीच्या धुळीवर मारिली तेव्हां

मनुष्य व पशु यांना उवा झाल्या; जमिनीवरल्या
धुळीच्या सर्व मिसर देशभर उवाच उवा बनल्या.
१८ उवा उत्पन्न करण्यासाठीं जादुगिरांनीं आपले
मंत्र बोलून तसाच प्रकार केला, पण त्यांना तें
साधेना; मनुष्य व पशु उवांनीं भरून गेले. १९ तेव्हां
जादुगीर फारोस म्हणाले, यांत देवाचा हात आहे;
तरी फारोचें मन कठीण होऊन त्यानें त्यांचें ऐकलें
नाहीं; परमेश्वरानें असें सांगितलेंच होतें.

२० नंतर परमेश्वरानें मोशाला सांगितलें कीं
पहाटेस ऊठ आणि जाऊन फारोपुढें उभा राहा; तो
त्या वेळीं नदीवर येईल; तूं त्याला सांग, परमेश्वर
म्हणतो, माझ्या लोकांनीं माझी उपासना करावी म्हणून
तूं त्यांस जाऊं दे. २१ त्यांस जाऊं देणार नाहींस
तर पाहा, तुजवर, तुझ्या सेवकांवर, तुझ्या प्रजेवर,
आणि तुझ्या घरांत मी गोमाश्यांचे थवे पाठवीन; मिसरी
लोकांचीं घरें व ते राहतात तो सर्व प्रदेश गोमाश्यांच्या
थव्यांनीं व्यापून टाकीन. २२ तथापि गोशेन प्रांतांत
माझे लोक राहत आहेत, तो मी त्या दिवशीं अलग
करीन; गोमाश्यांचे थवे तेथें जाणार नाहींत; यावरून
पृथ्वीवर मीच परमेश्वर आहें हें तुला कळेल.
२३ माझ्या प्रजेमध्यें व तुझ्या प्रजेमध्यें मी भेद
राखीन; उद्यां हा चमत्कार होईल. २४ त्याप्रमाणें
परमेश्वरानें केलें; फारोच्या मंदिरांत, त्याच्या
सेवकांच्या घरांत व अवघ्या मिसर देशांत गोमाश्यांचे
थव्यांचे थवे आले; गोमाश्यांच्या त्या थव्यांनीं मिसर
देशाची खराबी झाली.

२५ मग फारोनें मोशे व अहरोन यांस
बोलावून आणून म्हटलें, तुम्ही जा, याच देशांत
आपल्या देवाला यज्ञ करा. २६ मोशे म्हणाला,
असें करणें उचित नाहीं, कारण आम्ही जो यज्ञ
आमचा देव परमेश्वर यास करणार आहों त्याची
मिसरी लोकांस किळस येईल; मिसरी लोकांच्या
दृष्टीनें किळसवाणा असा यज्ञ आम्हीं केल्यास ते
आम्हांस दगडमार करावयाचे नाहींत काय ? २७ आम्ही
रानांत तीन दिवसांच्या वाटेवर जाऊं आणि परमेश्वर
आमचा देव आम्हांस सांगेल त्याप्रमाणें त्याला यज्ञ
करूं. २८ फारो बोलला, तुम्हीं रानांत जाऊन परमे-
श्वर तुमचा देव यास यज्ञ करावा यासाठीं मी तुम्हांस
जाऊं देतों; मात्र फार दूर जाऊं नका; माझ्यासाठीं
विनंति करा. २९ मोशे म्हणाला, पाहा, मी तुज-
पासून जातों आणि परमेश्वराला विनंति करितों कीं
फारो व त्याचे सेवक आणि त्याची प्रजा यांजवरील
गोमाश्यांचे थवे उद्यां निघून जावोत; मात्र परमेश्वरा-
प्रीत्यर्थ यज्ञ करण्यासाठीं लोकांस जाऊं न देण्यासंबंधानें
फारोनें पुनरपि वंचना करूं नये. ३० मग मोशानें
फारोसमोरून निघून जाऊन परमेश्वराची विनवणी केली.
३१ परमेश्वरानें मोशाच्या विनंतीप्रमाणें केलें; फारो,
त्याचे सेवक आणि त्याची प्रजा यांजवर आलेल्या
गोमाश्यांचे थवे त्यानें दूर केले; एकहि गोमाशी राहिली
नाहीं. ३२ तथापि फारोनें या खेपेसहि आपलें मन
कठीण केलें आणि लोकांस जाऊं दिलें नाहीं.

९ १ मग परमेश्वर मोशाला म्हणाला, फारोला
जाऊन सांग, इब्र्यांचा देव परमेश्वर असें सांगतो
कीं माझ्या लोकांनीं माझी उपासना करावी म्हणून
त्यांस जाऊं दे. २ तूं त्यांस जाऊं देणार नाहींस
आणि त्यांस अजूनहि अडवून ठेविशील, ३ तर
पाहा; घोडे, गाढवें, उंट, गुरेंढोरें, शेरडेंमेंढरें हे
जे तुझे पशु रानांत आहेत त्यांवर परमेश्वराचा हात
पडेल; भयंकर मरी उद्भवेल. ४ इस्राएल लोकांचीं
गुरेंढोरें आणि मिसरी लोकांचीं गुरेंढोरें यांच्यामध्यें
परमेश्वर भेद राखील; इस्राएल लोकांचा एकहि पशु
मरावयाचा नाहीं. ५ मग परमेश्वरानें वेळ ठरविला
आणि म्हटलें कीं उद्यां मी परमेश्वर या देशांत ही
गोष्ट करणार. ६ दुसरे दिवशीं परमेश्वरानें ही गोष्ट
केली आणि मिसर देशांतील सर्व गुरें मेलीं; तथापि
इस्राएल लोकांच्या गुरांपैकीं एकहि दगावलें नाहीं.
७ फारोनें माणसें पाठवून पाहिलें तों इस्राएल
लोकांच्या गुरांपैकीं एकहि मेलें नव्हतें. तथापि
फारोचें मन कठीणच राहिलें, त्यानें लोकांस
जाऊं दिलें नाहीं.

८ नंतर परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस
सांगितलें कीं आव्यांतील पसाभर राख घेऊन मोशानें
फारोच्या समक्ष आकाशाकडे उधळावी; ९ म्हणजे त्या
धुळीचे बारीक कण मिसर देशभर पसरतील आणि
सगळ्या देशांतील मनुष्य व पशु यांस त्यामुळें गळवें
व फोड येतील. १० ते आव्यांतील राख घेऊन
फारोपुढें उभे राहिले; मोशानें ती आकाशाकडे
उधळली तेव्हां तिच्या योगें मनुष्य व पशु यांस
गळवें व फोड आले. ११ गळवांमुळें जादुगिरांच्यानें
मोशापुढें उभें राहवेना, कारण जादुगीर व सर्व मिसरी
लोक यांस गळवें आलीं होतीं. १२ तथापि
परमेश्वरानें फारोचें मन कठीण केलें आणि त्यानें
त्यांचें ऐकलें नाहीं; परमेश्वरानें मोशाला असें
सांगितलेंच होतें.

१३ परमेश्वर मोशाला म्हणाला, पहाटेस उठून
फारोपुढें उभा राहा आणि त्याला सांग, इब्र्यांचा देव
परमेश्वर असें म्हणतो कीं माझ्या लोकांनीं माझी
उपासना करावी म्हणून त्यांस जाऊं दे. १४ नाहीं
तर ह्या खेपेस मी सर्व प्रकारच्या पीडा तुझ्या
हृदयावर, तुझ्या सेवकांवर व तुझ्या प्रजेवर पाठवितों,
म्हणजे अखिल पृथ्वीवर मजसारखा अन्य कोणी नाहीं
हें तुला यावरून कळेल. १५ मीं आपला हात
उगारून तुझ्यावर व तुझ्या प्रजेवर मरीचा प्रहार
केला असता आणि पृथ्वीवरून तुझा उच्छेद झाला
असता, १६ तथापि मीं तुला आपलें सामर्थ्य
दाखवावें आणि माझें नाम साऱ्या पृथ्वीवर विख्यात
व्हावें यासाठींच मीं तुला राखिलें आहे. १७ तूं
अद्यापि माझ्या लोकांशीं चढेलपणानें वर्तून त्यांस जाऊं
देत नाहींस काय ? १८ पाहा, उद्यां या वेळेस मी
गारांची अशी भयंकर वृष्टि करीन कीं मिसरी राष्ट्राची
स्थापना झाल्यापासून आजवर तशी वृष्टि झाली नाहीं.
१९ तर आतां माणसें पाठवून रानांतून तुझीं गुरें व
दुसरें जें कांहीं रानांत असेल तें आण; जीं माणसें
व पशु घरीं आडोशास न आणिल्यामुळें रानांत
सांपडतील त्यांजवर गारांची झोड पडून तीं मरतील.
२० फारोच्या सेवकांपैकीं ज्यांस परमेश्वराच्या सांगण्याची
भीति वाटली त्यांनीं आपले दास व गुरें पळवून
घरीं आणिलीं; २१ आणि ज्यांनीं परमेश्वराच्या
सांगण्याची परवा केली नाहीं त्यांनीं आपले दास
व गुरें रानांत राहूं दिलीं.

२२ मग परमेश्वर मोशास म्हणाला, तूं आपला
हात आकाशाकडे उभार म्हणजे सर्व मिसर देशावर
गारांची वृष्टि होईल; मिसर देशांतील मनुष्यांवर,
पशूंवर व शेतांतील हरएक वनस्पतीवर ती होईल.
२३ मोशानें आपली काठी आकाशाकडे उभारिली तेव्हां
परमेश्वरानें मेघगर्जना व गारांची वृष्टि केली आणि
अग्नीचा लोळ जमिनीपर्यंत येऊं लागला; या प्रकारें
परमेश्वरानें मिसर देशावर गारांचा वर्षाव केला.
२४ याप्रमाणें गारा पडत असतां मधूनमधून अग्नीचा
लोळ दिसत होता; ही गारांची वृष्टि एवढी भारी होती
कीं मिसरी राष्ट्राची स्थापना झाल्यापासून त्यांत कोठेंहि
तशी कधीं झाली नव्हती. २५ सर्व मिसर देशांत,
मनुष्यें, गुरेंढोरें वगैरे जें कांहीं वनांत होतें त्या
सर्वांवर, गारांचा मारा झाला; शेतांतील सर्व वनस्पतीवर
मारा झाला आणि वनांतील सर्व वृक्ष मोडून गेले.
२६ मात्र गोशेन प्रांतांत इस्राएल लोक राहत होते
तेथें मुळींच गारा पडल्या नाहींत.

२७ तेव्हां फारोनें मोशे व अहरोन यांस बोलावून
आणून म्हटलें, मीं या खेपेस पाप केलें आहे, परमेश्वर
न्यायी आहे आणि मी व माझी प्रजा अपराधी आहों. २८
तुम्ही परमेश्वराची विनवणी करा; ही प्रचंड गर्जना व
गारांची वृष्टि झाली आहे तेवढी पुरे, मी तुम्हांस जाऊं
देतों; तुम्हांला इतःपर राहावयाला नको. २९ मोशे त्यास
म्हणाला, मी नगराबाहेर गेलों कीं परमेश्वराकडे
आपले हात पसरीन तेव्हां मेघगर्जना बंद होईल व
गारा पडावयाच्या नाहींत; यावरून तुला कळेल कीं
पृथ्वी परमेश्वराची आहे. ३० तथापि हें मला ठाऊक
आहे कीं अजूनहि तूं आणि तुझे सेवक परमेश्वर
देव याला भीत नाहींत. ३१ त्या समयीं जवस व सातू
यांचा नाश झाला; कां कीं सातू निसवले होते आणि

अवसाला बोंडें आलीं होतीं; ३२ पण गहूं व काळ्या-
गहूं यांचा नाश झाला नाहीं; कारण ते अद्याप फारसे
वाढले नव्हते. ३३ मोशे फारोजवळून निघून नगरा-
बाहेर गेला आणि परमेश्वराकडे त्यानें आपले हात
पसरले तेव्हां मेघगर्जना व गारा बंद झाल्या व
पृथ्वीवर पर्जन्यवृष्टि होण्याची थांबली. ३४ पाऊस,
गारा व गर्जना हीं बंद झालीं असें पाहून फारोनें व
त्याच्या सेवकांनीं आपलें मन कठीण करून पुनः पाप
केलें. ३५ फारोचें मन कठीण झालें व त्यानें इस्राएल
लोकांस जाऊं दिलें नाहीं; परमेश्वरानें मोशाच्या द्वारें
असें सांगितलेंच होतें.

१ नंतर परमेश्वर मोशाला म्हणाला, फारो-
१० समोर जा; मींच त्याचें व त्याच्या सेवकांचें मन
कठीण केलें आहे तें अशासाठीं कीं त्यांच्या-
मध्यें मीं हीं आपलीं चिन्हें प्रगट करावीं; २ मीं
मिसर देशाची कशी फजिती केली आणि त्यांच्यामध्यें
कायकाय चिन्हें प्रगट केलीं तें तुझ्या पुत्रपौत्रांच्या
कानीं जाऊं दे; म्हणजे मी परमेश्वर आहें हें तुम्हांस
कळेल. ३ मोशे व अहरोन फारोसमोर जाऊन त्याला
म्हणाले, इब्र्यांचा देव परमेश्वर असें म्हणतो, तूं
मजसमोर कोठवर नमावयाचा नाहींस? माझ्या
लोकांस माझी उपासना करावयास जाऊं दे. ४ तूं
माझ्या लोकांस जाऊं देणार नाहींस तर पाहा, मी
उद्यां तुझ्या मुलखांत टोळ आणीन; ५ ते भूतल
एवढें झाकून टाकितील कीं जमीन दिसेनाशी होईल;
गारांच्या वृष्टीपासून निभावून जें कांहीं शेष उरलें
असेल त्याचा ते फन्ना उडवितील; वनांत तुमचे
जितके वृक्ष लागलेले आहेत त्यांचाहि ते फन्ना
उडवितील; ६ तुझीं घरें, तुझ्या सर्व सेवकांचीं घरें
आणि साऱ्या मिसऱ्यांचीं घरें ते व्यापून टाकितील;
इतके टोळ तुझ्या बापदादांनीं किंवा त्यांच्या वाड-
वडिलांनीं आजवर कधीं जन्मांत पाहिले नव्हते. मग
मोशे मागें फिरून फारोपासून निघून गेला. ७ फारोचे
सेवक त्याला म्हणाले, आम्ही असे या मनुष्याच्या
पाशांत कोठवर राहणार? त्यांचा देव जो परमेश्वर
त्याची उपासना करावयासाठीं या लोकांस जाऊं द्या;
मिसर देश विध्वस्त झाला आहे, हें आपणांला अजून
कळत नाहीं काय? ८ मग मोशे आणि अहरोन यांस पुनः
फारोकडे बोलावून आणिलें आणि तो त्यांस म्हणाला,
तुम्ही जाऊन आपला देव परमेश्वर याची उपासना
करा; पण जाणार कोणकोण? ९ मोशानें म्हटलें,
आमचे आबालवृद्ध, आमचे पुत्र व कन्या, आमचीं
शेरडेंमेंढरें व गुरेंढोरें या सर्वांस घेऊन आम्ही
जाणार; कारण परमेश्वराप्रीत्यर्थ आम्हांस उत्सव
करावयाचा आहे. १० तो त्यांस म्हणाला, मी तुम्हांस
तुमच्या मुलांबाळांसह जाऊं दिलें तर परमेश्वराची
शपथ; संभाळा, मनसुबा वाईट आहे; ११ असें होणें
नाहीं; तुमच्यांतील पुरुषांनीं जाऊन परमेश्वराची
उपासना करावी; तुम्ही तरी हेंच मागत आहां. मग
त्यांस फारोपुढून घालवून दिलें.

१२ परमेश्वर मोशाला म्हणाला, मिसर देशावर
आपला हात उगार म्हणजे त्यावर टोळ येऊन
गारांच्या सपाट्यांतून जी वनस्पति वांचून राहिली
आहे त्या सगळीचा ते फन्ना उडवितील. १३ मोशानें
मिसर देशावर आपली काठी उगारिली, तेव्हां
परमेश्वरानें दिवसभर व रात्रभर देशावर पूर्वेचा वारा
वाहविला; आणि सकाळ झाली तेव्हां पूर्वेच्या वाऱ्या-
बरोबर टोळ आले. १४ सर्व मिसर देशावर
टोळांनीं धाड घातली आणि ते त्याच्यावर सर्व भागीं
उतरले; ते असंख्य होते; यापूर्वी एवढे टोळ कधीं आले
नव्हते व यापुढेंहि कधीं येणार नाहींत. १५ त्यांनीं
सर्व पृथ्वीचा पृष्ठभाग झाकून टाकिल्यामुळें सर्व
भूमीवर अंधार पडला आणि त्यांनीं भूमीवरील सर्व
वनस्पति आणि गारांच्या वृष्टींतून बचावून राहिलेलीं
सर्व फळें खाऊन टाकिलीं; सर्व मिसर देशांत
वृक्षांपैकीं अथवा शेतांतील वनस्पतींपैकीं हिरवें म्हणून
कांहीं राहिलें नाहीं. १६ मग फारोनें मोशे व अह-
रोन यांस त्वरेनें बोलावून आणून म्हटलें कीं मी
तुमचा देव परमेश्वर याचा व तुमचा गुन्हेगार आहें.
१७ तर आतां एक वेळ माझ्या अपराधाची क्षमा

करा आणि ह्या एवढ्या मृत्यूपासून माझें निवारण
करावें म्हणून तुम्ही आपला देव परमेश्वर याजपाशीं
विनंति करा. १८ मोशानें फारोजवळून निघून जाऊन
परमेश्वरापाशीं विनंति केली. १९ तेव्हां परमेश्वरानें
पश्चिम दिशेचा प्रचंड वारा वाहविला; त्यानें त्या
टोळांस उडवून तांबड्या समुद्रांत लोटिलें; मिसर
देशाच्या सर्व हद्दींत एकहि टोळ राहिला नाहीं.
२० तथापि परमेश्वरानें फारोचें मन कठीण केलें,
आणि त्यानें इस्राएल लोकांस जाऊं दिलें नाहीं.

२१ मग परमेश्वरानें मोशाला सांगितलें, आकाशा-
कडे आपला हात उभार म्हणजे मिसर देशावर
अंधकार पडेल, इतका कीं तो हाताला लागेल.
२२ तेव्हां मोशानें आपला हात आकाशाकडे उभारिला,
आणि तीन दिवस सर्व मिसर देशभर निबिड अंधकार
झाला; २३ तीन दिवस कोणी कोणास दिसेना कीं
कोणी आपलें ठिकाण सोडून हालेना; पण इस्राएल
लोकांच्या सगळ्या वस्तींत उजेड होता. २४ मग
फारो मोशाला बोलावून म्हणाला, तुम्ही जाऊन
परमेश्वराची उपासना करा; तुमचीं शेरडेंमेंढरें व
गुरेंढोरें मात्र येथेंच राहिलीं पाहिजेत; आपल्या
मुलांबाळांस घेऊन जा. २५ मोशे म्हणाला, आमचा
देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ यज्ञ करण्यासाठीं यज्ञपशु
व होमबलि तूं आमच्या हवालीं केले पाहिजेत;
२६ आमचे पशूहि आमच्याबरोबर गेले पाहिजेत,
एक खुरहि मागें राहतां कामा नये; कारण यांतूनच
आमचा देव परमेश्वर याच्या उपासनेसाठीं यज्ञपशु
घ्यावे लागतील; आणि परमेश्वराच्या उपासनेस काय
लागेल तें आम्हांस तेथें जाऊन पोहंचेपर्यंत
कळावयाचें नाहीं. २७ तथापि परमेश्वरानें फारोचें
मन कठीण केलें, आणि त्यानें त्यांस जाऊं दिलें नाहीं.
२८ फारो त्यास म्हणाला, माझ्यापुढून चालता हो
आणि संभाळ, पुन्हां मला आपलें तोंड दाखवूं नको; तूं
आपलें तोंड मला दाखविशील त्या दिवशीं प्राणास
मुकशील. २९ मोशे म्हणाला, तूं ठीक बोललास; मी
पुनः तुझें तोंड कधीं पाहावयाचा नाहीं.

११ १ नंतर परमेश्वर मोशाला म्हणाला, मी
फारोवर व मिसर देशावर आणखी एक पीडा
पाठवितों; त्यानंतर तो तुम्हांस येथून जाऊं
देईल; आणि तो जाऊं देईल तेव्हां तो तुम्हांस येथून
अजीबात हाकून देईल. २ तूं लोकांच्या कानांत
सांगून ठेव कीं प्रत्येक पुरुषानें आपल्या शेजाऱ्या-
पासून व प्रत्येक स्त्रीनें आपल्या शेजारणीपासून
सोन्याचांदीचे दागिने मागून घ्यावे. ३ मिसरी
लोकांची इस्राएल लोकांवर कृपादृष्टि होईसें परमेश्वरानें
केलें. तशांत मिसर देशांत फारोचे सेवक आणि सामान्य
लोक यांच्या दृष्टीनें मोशे हा पुरुष अति थोर होता.
४ मग मोशे म्हणाला, परमेश्वर असें म्हणतो कीं
आज मध्यरात्रीच्या सुमारास मी मिसर देशामध्यें
फिरेन; ५ तेव्हां मिसराच्या सिंहासनावर आरूढ
असलेल्या फारोपासून तों जात्यावर बसणाऱ्या दासी-
पर्यंत सर्वांचे ज्येष्ठ पुत्र व गुरांचेहि प्रथम वत्स मरतील.
६ मिसर देशभर मोठा हाहाकार होईल; पूर्वी कधीं
झाला नव्हता आणि पुढें कधीं व्हावयाचा नाहीं असा.
७ तथापि इस्राएल लोकांपैकीं कोणावर, फार काय
त्यांच्या पशूंवरहि, कुत्रा देखील भुंकणार नाहीं; यावरून
मिसरी लोकांत व इस्राएल लोकांत मी परमेश्वर कसा
भेद ठेवितों हें तुम्हांस कळेल. ८ तेव्हां हे तुझे
सर्व सेवक मजपाशीं येऊन मला नमून म्हणतील कीं
आपल्या परिवारासह आपण निघून जावें, तेव्हां मी
निघून जाईन. यावर मोशे रागानें संतप्त होऊन
फारोजवळून निघून गेला.

९ परमेश्वर मोशाला म्हणाला होता कीं फारो तुमचें
ऐकावयाचा नाहीं, कारण मिसर देशांत माझीं बहुत
अद्भुतें घडावीं अशी माझी इच्छा आहे. १० मोशे
व अहरोन यांनीं फारोसमोर हीं सर्व अद्भुतें केलीं
तरी परमेश्वरानें फारोचें मन कठीण केलें, आणि त्यानें
इस्राएल लोकांस आपल्या देशांतून जाऊं दिलें नाहीं.

१२ १ मग परमेश्वरानें मिसर देशांत मोशे व
अहरोन यांस सांगितलें कीं, २ हा महिना
तुम्हांस आरंभींचा महिना व्हावा; तुमचा हा

वर्षाचा पहिला महिना व्हावा. ३ इस्राएलाच्या सर्व
मंडळीस सांग कीं या महिन्याच्या दशमीस तुम्हीं
आपआपल्या वाडवडिलांच्या घराण्यांप्रमाणें एकाएका
घराण्यामागें एकेक कोकरूं घ्यावें; ४ आणि एक
कोकरूं खपावयाचें नाहीं इतकीं थोडकीं माणसें
कोणाच्या घराण्यांत असलीं तर त्यानें व त्याच्या
घराजवळच्या शेजाऱ्यानें आपल्या घराण्यांतील संख्येप्रमाणें
कोकरूं घ्यावें; प्रत्येकाच्या आहाराच्या मानानें एक
कोकरूं किती माणसांस पुरेल याचा हिशोब करावा.
५ कोकरूं घ्यावयाचें तें निर्दोष असून तो एक वर्षाचा नर
असावा; हा नर मेंढरांतला किंवा बोकडांतला, तुम्हांस
वाटेल तो घ्यावा; ६ या महिन्याच्या चतुर्दशी-
पर्यंत तें राखून ठेवावें; आणि संध्याकाळीं इस्राएल
मंडळींतील लोकांनीं तें वधावें; ७ त्याचें रक्त घेऊन
ज्या घरांत त्या कोकराचें मांस खाणार त्याच्या दोन्ही
दारबाह्यांला व चौकटीच्या कपाळपट्टीला लावावें.
८ आणि त्यांनीं त्याच रात्रीं त्याचें मांस विस्तवावर
भाजून तें बेखमीर भाकरीबरोबर खावें; कडू भाजी-
बरोबर तें खावें. ९ मांस कच्चें खाऊं नये आणि पाण्यांत
शिजवून खाऊं नये, तर तें विस्तवावर भाजून खावें;
त्याची मुंडी, पाय व आंतडीं यांसुद्धां तें खावें.
१० त्यांतलें सकाळपर्यंत कांहीं राहूं देऊं नये आणि
सकाळपर्यंत कांहीं राहिलेंच तर तें आगींत टाकून
जाळावें. ११ तें तुम्हीं या रीतीनें खावें: तुमच्या
कमरा कसून, पायांत जोडे घालून आणि हातांत
काठी घेऊन तें घाईघाईनें खावें; हा परमेश्वराचा
वल्हांडण सण होय. १२ कारण या रात्रीं मिसर
देशांत फिरून त्यांतील मनुष्य व पशु या सर्वांचे
प्रथम जन्मलेले मी मारून टाकीन आणि मिसरांतील सर्व
देवांचें शासन करीन; मी परमेश्वर आहें. १३ आणि
ज्या घरांत तुम्ही असणार त्यावर तें रक्त तुम्हांप्रीत्यर्थ
खूण होईल. मी जेव्हां रक्त पाहीन तेव्हां तुम्हांस
ओलांडून जाईन, मिसर देशाच्या लोकांस मी मारीन
तेव्हां तुम्हांवर अनर्थ येणार नाहीं, तुमचा नाश
व्हावयाचा नाहीं. १४ हा दिवस तुम्हांस स्मारका-
दाखल होईल, या दिवशीं तुम्हीं परमेश्वराप्रीत्यर्थ मेळा
भरवून सण पाळावा; पिढ्यानपिढ्या अगदीं कायमचा
विधि समजून हा सण तुम्हीं पाळावा.

१५ सात दिवस तुम्हीं बेखमीर भाकरी खावी;
पहिल्याच दिवशीं तुमच्या घरांतील सर्व खमीर काढून
टाकावें; पहिल्या दिवसापासून सातव्या दिवसापर्यंत जो
कोणी खमिराची भाकरी खाईल त्याचा इस्राएलांतून
उच्छेद व्हावा. १६ पहिल्या दिवशीं तुमचा पवित्र मेळा
भरवावा, तसाच सातव्या दिवशींहि पवित्र मेळा भरवावा;
या दोन्ही दिवशीं कांहीं काम करूं नये; मात्र प्रत्येक
मनुष्याच्या खाण्यापिण्यासंबंधानें जें कांहीं करावयाचें
असेल तें करावें. १७ या प्रकारें तुम्ही बेखमीर
भाकरीचा सण पाळावा; कारण याच दिवशीं मीं
तुमच्या सेना मिसर देशांतून बाहेर आणिल्या आहेत;
यास्तव हा दिवस पिढ्यानपिढ्या कायमचा विधि म्हणून
पाळावा. १८ पहिल्या महिन्याच्या चतुर्दशीच्या संध्याकाळ-
पासून तों त्या महिन्याच्या एकविसाव्या दिवसाच्या संध्या-
काळपर्यंत तुम्हीं बेखमीर भाकरी खाव्या. १९ सात
दिवसपर्यंत तुमच्या घरांत मुळींच खमीर नसावें; कारण
जो कोणी एखादी खमिराची वस्तु खाईल, तो परदेशीय
असो कीं स्वदेशीय असो, त्याचा इस्राएलाच्या मंडळींतून
उच्छेद करावा. २० तुम्हीं कसलाहि खमिराचा पदार्थ
खाऊं नये; तुम्हीं घरोघर बेखमीर भाकरी खाव्या.

२१ मग मोशानें इस्राएलाच्या सर्व वडील जनांस
बोलावून म्हटलें, तुम्ही आपआपल्या घराण्याप्रमाणें
एकएक कोकरूं निवडून घ्यावें आणि वल्हांडणाचा
यज्ञपशु वधावा; २२ नंतर एजोब झाडाची एक जुडी
घेऊन ती पात्रांतील रक्तांत बुचकळावी आणि तिनें
त्यांतलें रक्त दरवाजाच्या कपाळपट्टीला व दोन्ही
बाह्यांना लावावें; आणि सकाळपर्यंत कोणींहि घराच्या
दाराबाहेर जाऊं नये. २३ कारण परमेश्वर मिसऱ्यांना
वध करण्यासाठीं देशांत फिरणार आहे; ज्या ज्या
घराच्या कपाळपट्टीवर व दोन्ही बाह्यांवर रक्त लाविलेलें

१ निर्गम ५ : १ वरील टीप पाहा.

परमेश्वर पाहील तें तें दार तो ओलांडून जाईल
आणि वध करणाऱ्यास तुमचा वध करण्यासाठीं
तुमच्या घरांत जाऊं देणार नाहीं. २४ हा विधि
तुम्हांला व तुमच्या पुत्रपौत्रांला निरंतरचा आहे असें
समजून तो पाळावा. २५ वचनदत्त देश परमेश्वर तुम्हांस
देईल, त्यांत तुम्ही जाल तेव्हां हा उपासनेचा प्रकार
तुम्हीं पाळावा. २६ तुमचीं मुलेंबाळें तुम्हांस विचारितील
कीं या उपासनेचा अर्थ काय? २७ तेव्हां तुम्ही सांगा
कीं हा परमेश्वराच्या वल्हांडणाचा यज्ञ आहे; त्यानें
मिसरी लोकांस मारिलें व आपल्या घरांचा बचाव
केला त्या समयीं तो मिसरांतील इस्राएलांचीं घरें
ओलांडून गेला. हें ऐकून लोकांनीं मस्तकें लववून
दंडवत घातलें. २८ इस्राएल लोकांनीं जाऊन तसें
केलें; परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस आज्ञा दिली
त्याप्रमाणें त्यांनीं केलें.

२९ मध्यरात्रीं असें झालें कीं मिसर देशांतील
सिंहासनावर आरूढ असलेल्या फारोच्या ज्येष्ठ
पुत्रापासून बंदिगृहांत पडलेल्या कैद्याच्या ज्येष्ठ
पुत्रापर्यंत सर्व, आणि गुरांढोरांपैकीं सर्व प्रथम
वत्स परमेश्वरानें मारून टाकिले. ३० रात्रीच्या समयीं
फारो, त्याचे सर्व सेवक आणि सगळे मिसरी लोक
जागे झाले; आणि मिसर देशांत मोठा हाहाकार
उडाला, कारण ज्यांत कोणी मेला नाहीं असें एकहि
घर राहिलें नाहीं. ३१ तेव्हां फारोनें रातोरात मोशे
व अहरोन यांस बोलावून सांगितलें, तुम्ही व सगळे
इस्राएल लोक माझ्या लोकांतून निघून जा; तुम्ही
म्हणतां त्याप्रमाणें जाऊन परमेश्वराची उपासना करा.
३२ तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें आपलीं शेरडेंमेंढरें व
गुरेंढोरें घेऊन चालते व्हा; आणि मलाहि आशीर्वाद
द्या. ३३ इस्राएल लोकांनीं देशांतून तात्काळ निघून
जावें म्हणून मिसरी लोकांनीं त्यांच्यामागें तगादा
लाविला; ते म्हणाले, आम्ही सर्व मेलोंच आहों.
३४ इस्राएल लोकांनीं मळिलेली कणीक खमीर न
घालतां तशीच काथवटीसहित कपड्यांत बांधून
खांद्यावर घेतली ३५ मोशाच्या सांगण्याप्रमाणें
इस्राएल लोकांनीं केलें; त्यांनीं मिसरी लोकांपासून
सोन्यारुप्याचे दागिने व वस्त्रेंप्रावरणें मागून घेतलीं;
३६ मिसरी लोकांची कृपादृष्टि इस्राएल लोकांवर
होईसें परमेश्वरानें केलें, म्हणून त्यांनीं जें जें मागितलें
तें तें त्यांनीं त्यांस दिलें; अशा प्रकारें त्यांनीं मिसरी
लोकांस लुटिलें.

३७ मग इस्राएल लोक रामसेस येथून कूच करून
सुक्कोथ येथें गेले; जे पुरुष पायीं गेले ते मुलेंबाळें
खेरीजकरून सुमारें सहा लाख होते. ३८ त्यांच्याबरोबर
लोकांचा मोठा मिश्र समुदाय गेला; तशींच शेरडेंमेंढरें,
गुरेंढोरें वगैरे पुष्कळ जनावरें गेलीं. ३९ त्यांनीं
आपल्याबरोबर मिसर देशांतून मळिलेली कणीक आणिली
होती, तिच्या बेखमीर भाकरी भाजिल्या, तिच्यांत
कांहीं खमीर नव्हतें; मिसर देशांतून त्यांस जबरीनें
बाहेर काढिलें होतें, यास्तव त्यांना थांबावयास अवकाश
मिळाला नाहीं; त्यांस खाण्यासाठीं कांहीं तयार करून
घेतां आलें नाहीं. ४० इस्राएल लोक मिसर देशांत
येऊन राहिल्यास चारशेंतीस वर्षें लोटलीं होतीं.
४१ चारशेंतीस वर्षांच्या अखेरीस बरोबर त्याच दिवशीं
परमेश्वराच्या सर्व सेना मिसर देशांतून बाहेर निघाल्या.
४२ परमेश्वरानें त्यांस मिसर देशांतून बाहेर काढिलें
ह्याकरितां ही परमेश्वराप्रीत्यर्थ जागरणाची रात्र म्हणून
अवश्य पाळावी; इस्राएल लोकांनीं पिढ्यानपिढ्या ही रात्र
परमेश्वराप्रीत्यर्थ जागरणाची म्हणून अवश्य पाळावी.

४३ परमेश्वर मोशे व अहरोन यांस म्हणाला,
वल्हांडण सणाचा विधि असा: कोणी विदेश्यानें
त्यांतलें कांहीं खाऊं नये; ४४ तथापि कोणी
पैका देऊन एखादा दास विकत घेतलेला असल्यास
त्याची सुंता झाल्यावर त्यानें त्यांतलें खावें.
४५ उपरी अथवा मोलकरी यांपैकीं कोणी तें खाऊं
नये. ४६ हें भोजन एकाच घरांत झालें पाहिजे;
त्या मांसांतील कांहींएक घराच्या बाहेर नेऊं नये आणि
यज्ञपशूंचें एक हाडहि तोडूं नये. ४७ इस्राएलाच्या
समस्त मंडळीनें हा विधि पाळावा. ४८ कोणी
परदेशीय तुम्हांबरोबर राहत असून परमेश्वराप्रीत्यर्थ

बलिदान सण पाळूं इच्छील तर त्याच्या घरच्या सर्व पुरुषांची सुंता व्हावी; मग त्याला जवळ येऊन सण पाळूं द्यावा आणि देशी मनुष्याप्रमाणें त्यास गणावें; पण बेसुनत पुरुषानें त्यांतलें कांहीं खातां कामा नये. ४९ स्वदेशीय व तुमच्यामध्यें राहणारा या दोघांस एकच नियम असावा. ५० या प्रकारें सर्व इस्राएल लोकांनीं केलें; परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस आज्ञा केल्याप्रमाणें त्यांनीं केलें. ५१ त्याच दिवशीं परमेश्वरानें इस्राएल लोकांच्या सेना टोळीटोळीनें मिसर देशांतून बाहेर आणिल्या.

१३ १ मग परमेश्वरानें मोशाला सांगितलें कीं २ इस्राएल लोकांमध्यें मनुष्य व पशु या दोहोंचे जे प्रथम जन्मलेले उदरांतून बाहेर येतात त्यांस माझ्याप्रीत्यर्थ पवित्र म्हणून वेगळे ठेव; ते माझे आहेत.

३ मोशे लोकांस म्हणाला, या दिवसाचें स्मरण ठेवा; याच दिवशीं तुम्ही मिसरांतून, दास्यगृहांतून बाहेर निघालां; परमेश्वरानें आपल्या भुजबलानें तुम्हांस या स्थलांतून बाहेर काढिलें, म्हणून या दिवशीं खमिराची भाकर खावयाची नाहीं. ४ तुम्ही अबीब महिन्याच्या ह्या दिवशीं निघालां आहां. ५ कनानी, हित्ती, अमोरी, हिव्वी आणि यबूसी यांच्या देशांत, तुझ्या पूर्वजांस परमेश्वरानें प्रतिज्ञापूर्वक देऊं केलेल्या दुधामधाचे प्रवाह चालले आहेत अशा देशांत त्यानें तुला आणिल्यावर या महिन्यांत तूं हा सण पाळावा. ६ सात दिवस बेखमीर भाकरी खाव्या आणि सातव्या दिवशीं परमेश्वराप्रीत्यर्थ सण करावा. ७ या सात दिवसांत बेखमीर भाकर खावी; खमिराची भाकर तुझ्यापाशीं नजरेस पडूं नये, तुझ्या देशभर खमिराचें दर्शनसुद्धां होऊं नये. ८ पुढील काळीं तूं आपल्या पुत्रास कळवावें कीं मी मिसर देशांतून निघालों तेव्हां परमेश्वरानें मजसाठीं जें कांहीं केलें त्यामुळें मी हा पाळीत आहें. ९ हें चिन्ह तुझ्या हातावर, तुझ्या दोन्ही डोळ्यांच्यामध्यें स्मारक असें असावें, परमेश्वराचा नियम तुझ्या मुखीं असावा; कारण कीं परमेश्वरानें बलवान् भुजानें तुला मिसर देशांतून बाहेर काढिलें; १० म्हणून तूं वर्षानुवर्ष नेमलेल्या समयीं हा विधि पाळावा.

११ परमेश्वरानें तुला व तुझ्या पूर्वजांला कनान्यांचा जो देश प्रतिज्ञापूर्वक देऊं केला त्यांत तो तुला नेऊन तो तुझ्या हातीं देईल, १२ तेव्हां उदरांतून निघालेला प्रथम पुरुष आणि जनावराच्या पोटचा प्रथम वत्स यांस परमेश्वराप्रीत्यर्थ वेगळें करावें; सर्व नर परमेश्वराचे होत. १३ गाढवाचा प्रथम वत्स एक कोकरूं देऊन सोडवून घ्यावा; त्याच्या मोबदला कांहीं न दिल्यास त्याची मान मुरगळावी· तुझ्या वंशांतले प्रथम नर मोबदला देऊन सोडवून घ्यावे. १४ पुढील काळीं तुझा पुत्र तुला विचारील कीं हें काय? तेव्हां त्यास सांग, मिसर देशांतून, दास्यगृहांतून परमेश्वरानें आम्हांस आपल्या भुजबलानें बाहेर काढिलें; १५ आणि फारो आम्हांस जाऊं देईना, तेव्हां परमेश्वरानें मिसर देशांत मनुष्य व पशु यांचे सर्व प्रथम नर मारून टाकिले; म्हणून उदरांतून निघालेल्या सर्व प्रथम नरांचा मी परमेश्वरास बलि अर्पितों; पण माझे सर्व ज्येष्ठ पुत्र मोबदला देऊन सोडवून घेतों. १६ तुझ्या हातावर आणि तुझ्या दोहों डोळ्यांच्या मध्यभागीं हें स्मारक चिन्ह व्हावें; कारण परमेश्वरानें आपल्या भुजबलानें आम्हांस मिसर देशांतून बाहेर आणिलें.

१७ फारोनें लोकांस जाऊं दिलें तेव्हां पलिष्टी लोकांच्या देशाची वाट जवळची असूनहि देवानें त्यांस त्या वाटेनें जाऊं दिलें नाहीं; युद्धप्रसंग पाहून हे लोक माघार घेऊन मिसरास परत जावयाचे असें देवास वाटलें; १८ म्हणून फेरा घेऊन रानाच्या वाटेनें त्यानें त्यांस तांबड्या समुद्राकडे नेलें; इस्राएल लोक मिसर देशांतून सशस्त्र होऊन बाहेर निघाले. १९ मोशानें आपल्याबरोबर योसेफाच्या अस्थि घेतल्या, कारण योसेफानें इस्राएल लोकांकडून आणभाक करवून त्यांस सांगितलें होतें कीं देव खात्रीनें तुम्हांस भेट देईल तेव्हां तुम्ही आपल्याबरो-

वर माझ्या अस्थि घेऊन जा. २० मग ते सुक्कोथ येथून
रवाना झाले आणि रानाच्या हद्दीवर एथामांत त्यांनीं
तळ दिला. २१ त्यांनीं रात्रंदिवस चालावें म्हणून परमेश्वर
दिवसा त्यांस मार्ग दाखविण्यासाठीं मेघस्तंभाच्या ठायीं
आणि रात्रीं त्यांस प्रकाश देण्यासाठीं अग्निस्तंभाच्या
ठायीं त्यांच्या पुढें चालत असे; २२ दिवसा मेघस्तंभ
व रात्रीं अग्निस्तंभ लोकांपुढून कधीं दूर होत नसत.

१४ १ परमेश्वरानें मोशास म्हटलें, २ इस्राएल
लोकांस असें सांग कीं तुम्हीं फिरून मिग्दोल
आणि समुद्र यांच्यामध्यें पी-हहीरोथापुढें बाल-
सफोनासमोर तळ द्यावा; त्यासमोर समुद्राजवळ आपले
डेरे उभारावे. ३ मग फारो इस्राएल लोकांसंबंधानें
म्हणेल कीं ते देशांत गोंधळले आहेत, त्यांना रानांत
कोंडमारा झाला आहे. ४ मी फारोचें मन कठीण
करीन आणि तो त्यांच्या पाठीस लागेल; या प्रकारें
फारो व त्याची सर्व सेना यांचा पराभव केल्यानें माझा
प्रताप प्रगट होईल आणि मी परमेश्वर आहें हें मिसरी
लोकांस कळेल. त्याप्रमाणें इस्राएलांनीं केलें. ५ इस्राएल
लोकांनीं पलायन केलें हें वर्तमान मिसराच्या राजास
कळलें तेव्हां फारोचें व त्याच्या सेवकांचें मन त्या
लोकांसंबंधानें बदललें, व ते म्हणूं लागले कीं इस्राएल
लोकांस आपल्या दास्यांतून सुटून जाऊं दिलें हें
आम्हीं काय केलें ? ६ तेव्हां त्यानें आपला रथ
सिद्ध करून आपले लोक आपल्याबरोबर घेतले;
७ त्यानें सहाशें निवडक रथ व मिसरांतले सर्व रथ
त्यांवरील सरदारांसह बरोबर घेतले. ८ परमेश्वरानें
मिसराचा राजा फारो याचें मन कठीण केलें आणि
तो इस्राएल लोकांच्या पाठीस लागला; इस्राएल
लोक तर मोठ्या अवसानानें चालले होते. ९ मग
फारोचे सर्व घोडे, रथ व स्वार यांसह मिसरी सैन्यानें
त्यांचा पाठलाग करून पी-हहीरोथानजीक व बाल-
सफोनासमोर समुद्रतीरीं त्यांनीं तळ दिला होता तेथें
त्यांस गांठिलें. १० फारो नजीक येऊन ठेपला;
इस्राएल लोकांनीं टेहळून पाहिलें तों मिसरी लोक
आपल्या पाठोपाठ येत आहेत असें त्यांस दिसलें,
तेव्हां त्यांस धडकी भरली व ते परमेश्वराचा धावा
करूं लागले. ११ ते मोशाला म्हणाले, मिसरांत काय
कबरा नव्हत्या म्हणून तूं आम्हांस येथें रानांत
मरावयास आणिलें ? आम्हांस तूं मिसरांतून बाहेर
काढिलें तें काय म्हणून ? १२ आम्ही तुला मिसरांत
नव्हतों का म्हणत कीं आम्ही आहों ते ठीक आहों,
आम्हांस आपले मिसरी लोकांचें दास्य करीत राहूं दे;
येथें रानांत मरून जावें त्यापेक्षां मिसऱ्यांचें दास्य
पतकरलें. १३ मोशे लोकांस म्हणाला, भिऊं नका,
स्थिर उभे राहा आणि परमेश्वर आज तुमचें तारण करील
तें पाहा, कारण जे मिसरी लोक तुम्ही आज पाहत
आहां ते पुनः कधींहि तुमच्या नजरेस पडावयाचे
नाहींत. १४ परमेश्वर तुम्हांसाठीं लढेल, तुम्ही उगे
राहा.

१५ मग परमेश्वर मोशाला म्हणाला, माझा धावा
करीत काय बसलास ? इस्राएल लोकांस सांग कीं पुढें
चला. १६ तूं आपली काठी उभार आणि आपला
हात समुद्रावर उगारून तो दुभाग, म्हणजे इस्राएल
लोक भरसमुद्रांत कोरड्या भूमीवर चालतील;
१७ आणि पाहा, मी स्वतः मिसऱ्यांचीं मनें कठीण
करीन आणि ते त्यांच्या पाठीस लागतील; आणि फारो,
त्याची सर्व सेना, त्याचे रथ व त्याचे स्वार यांचा पराभव
केल्यानें माझा महिमा प्रगट होईल. १८ फारो, त्याचे रथ
व त्याचे स्वार यांचा पराभव केल्यानें माझा महिमा प्रगट
झाला म्हणजे मी परमेश्वर आहें हें मिसरी लोकांस कळेल.
१९ तेव्हां देवाचा दूत इस्राएली सेनेच्या पुढें चालत
असे तो निघून सेनेच्या मागें गेला, आणि मेघस्तंभ
त्यांच्या आघाडीहून निघून त्यांच्या पिछाडीस उभा
राहिला; २० तो मिसऱ्यांची सेना आणि इस्राएलांची
सेना यांच्यामध्यें राहिला; मेघ व अंधकार होता
तरी तो रात्रीचा प्रकाश देत होता; रात्रभर एका
पक्षाला दुसऱ्या पक्षाकडे जाववलें नाहीं.

२१ मोशानें आपला हात समुद्रावर उगारिला तेव्हां
परमेश्वरानें रात्रभर पूर्व दिशेचा जोराचा वारा वाहवून समुद्र
मागें हटविला, असा कीं पाणी दुभाग होऊन मध्यें कोरडी

अमीन झाली. २२ इस्राएल लोक भरसमुद्रांत कोरड्या
जमिनीवरून चालले आणि त्यांना उजवीकडे व डावीकडे
पाणी भिंतीसारखें झालें. २३ तेव्हां मिसऱ्यांनीं त्यांचा
पाठलाग केला आणि फारोचे सर्व घोडे, रथ व स्वार
त्यांच्या पाठोपाठ समुद्रामध्यें गेले. २४ तेव्हां रात्रीच्या
शेवटल्या प्रहरीं परमेश्वरानें अग्नीच्या व मेघाच्या
स्तंभांतून मिसरी सेनेकडे पाहून त्यांची त्रेधा उडविली.
२५ त्यानें त्यांच्या रथांचीं चाकें काढून ते चालविणें
कठीण केलें; तेव्हां मिसरी लोक म्हणूं लागले,
आपण इस्राएलांपासून पळून जाऊं, कारण परमेश्वर
त्यांच्या बाजूनें मिसऱ्यांशीं लढत आहे.

२६ परमेश्वर मोशाला म्हणाला, आपला हात
समुद्रावर उगार म्हणजे पाणी पूर्ववत् जमून मिसऱ्यांवर,
त्यांच्या रथांवर व स्वारांवर येईल. २७ मोशानें
समुद्रावर आपला हात उगारिला तेव्हां दिवस उजा-
डल्यावर समुद्र परतून त्याचा लोट पूर्ववत् वाहूं
लागला; त्यापुढें मिसरी लोक पळूं लागले, पण
परमेश्वरानें त्यांस समुद्रामध्यें उलथून पाडिलें.
२८ पाणी पूर्वस्थलीं परत आलें आणि रथ, घोडे
आणि फारोची सर्व सेना जी त्यांच्या पाठीस लागून
समुद्रामध्यें गेली होती ती सर्व त्यांत गडप झाली;
त्यांतला एकहि वांचला नाहीं; २९ पण इस्राएल
लोक भरसमुद्रांत कोरड्या जमिनीवरून चालून गेले;
त्यांना उजवीकडे व डावीकडे पाणी भिंतीप्रमाणें झालें.
३० या प्रकारें परमेश्वरानें त्या दिवशीं इस्राएल
लोकांस मिसऱ्यांच्या हातांतून सोडविलें आणि मिसरी
लोक समुद्रतीरीं मरून पडलेले इस्राएलांनीं डोळ्यांनीं
पाहिले. ३१ परमेश्वरानें मिसऱ्यांना आपला प्रबळ
हात दाखविला तो इस्राएलांनीं पाहिला, तेव्हां त्यांनीं
परमेश्वराचें भय धरिलें आणि परमेश्वरावर आणि
त्याचा सेवक मोशे याच्यावर त्यांनीं विश्वास ठेविला.

१५ १ तेव्हां मोशे आणि इस्राएल लोक
यांनीं परमेश्वराला हें गीत गाइलें; ते
म्हणाले :—

मी परमेश्वराला गीत गाईन, कारण तो विजयानें
उन्नत झाला आहे;
घोडा व राऊत त्यानें समुद्रांत उलथून टाकिला आहे.
२ परमेश माझें बल, माझा स्तोत्रविषय आहे,
तो माझा उद्धारक झाला आहे;
माझा देव हाच, याचें मी स्तोत्र गाईन;
हाच माझ्या पित्याचा देव, मी याचा महिमा गाईन.
३ परमेश्वर रणवीर आहे;
याव्हे हें त्याचें नाम.
४ फारोचे रथ व त्याची सेना हीं त्यानें समुद्रांत
उलथून टाकिलीं आहेत;
त्याचे निवडक सरदार तांबड्या समुद्रांत बुडाले
आहेत.
५ गहिऱ्या जलानें त्यांस गडप केलें आहे;
ते शिळेप्रमाणें जलाशयाच्या तळीं गेले आहेत.
६ हे परमेश्वरा, तुझा उजवा हात बलेंकरून प्रतापी
झाला आहे;
हे परमेश्वरा, तुझा उजवा हात शत्रूचा चुरा
करितो.
७ आपणाशीं सामना करणाऱ्यास तूं आपल्या महा-
प्रतापानें उलथून टाकितोस;
तूं आपला संताप भडकवितोस, तो त्यांस भुसा-
प्रमाणें भस्म करितो.
८ तुझ्या नाकपुड्यांच्या फुंकरानें जलाच्या राशि
बनल्या;
जलप्रवाह राशीप्रमाणें उभे राहिले,
जलाशय सागराच्या उदरीं थिजून गेले.
९ शत्रु म्हणाला,
मी पाठलाग करीन, मी गांठीन, मी लूट वांटून घेईन;
त्यांनीं माझा जीव तृप्त होईल;
मी तरवार उपसून आपल्या हातानें त्यांचा
विध्वंस करीन.
१० तूं आपल्या फुंकराचा वायु सोडिला तेव्हां
समुद्रानें त्यांस गडप केलें;
ते शिशाप्रमाणें महाजलाशयांत बुडून गेले.

११ हे परमेश्वरा, देवांमध्यें तुजसारखा कोण आहे ?
पावित्र्यामुळें वैभवी, स्तवनीय कृत्यांनीं भयानक,
अद्भुतें करणारा असा जो तूं त्या तुजसारखा
कोण आहे ?
१२ तूं आपला उजवा हात उगारिला,
आणि पृथ्वीनें त्यांस गिळून टाकिलें.
१३ आपण उद्धरलेल्या आपल्या लोकांस तूं स्वकरुणेनें
नेलें आहे; आपल्या बलानें तूं त्यांस आपल्या
पवित्र निवासाकडे घेऊन गेला आहेस.
१४ हें ऐकून राष्ट्रें कंपायमान झालीं आहेत;
पलेशेथनिवासी भयाकुल झाले आहेत.
१५ तेव्हां अदोमाचे अधिपति हैराण झाले;
मवाबाचे नायक थरथरां कांपत आहेत;
सर्व कनाननिवासी गलित झाले आहेत.
१६ भीति व दहशत त्यांस घेरितील;
तुझ्या बाहुप्रतापामुळें ते पाषाणाप्रमाणें स्तब्ध
होतील;
हे परमेश्वरा, तुझे लोक पार निघून जात तोंवर,
तूं खरेदी केलेली प्रजा पार निघून जाई तोंवर
असें होईल.
१७ तूं त्यांस नेशील आणि आपल्या वतनाच्या
गिरीवर आणून लावशील;
हे परमेश्वरा, तूं आपल्यासाठीं केलेलें निवासस्थान
हेंच आहे;
हे प्रभू, तुझ्या हातांनीं स्थापिलेलें तुझें पवित्र
स्थान हेंच.
१८ परमेश्वर युगानुयुग राज्य करील.
१९ फारोचे घोडे, रथ व स्वार, समुद्राच्या पोटीं
जाऊन पडले आणि परमेश्वरानें समुद्राचें पाणी
त्यांजवर वाहविलें, पण इस्राएल लोक भरसमुद्रामध्यें
कोरड्या जमिनीवरून चालत गेले, म्हणून त्यांनीं हें
गाइलें; २० मग अहरोनाची बहीण मिर्याम संदेष्ट्री हिनें
हातीं डफ घेतला आणि सर्व स्त्रिया डफ घेऊन
तिच्यामागून नृत्य करीत चालल्या. २१ आणि मिर्या-
मेनें त्यांच्या गाण्याला ध्रुपद धरिलें :
परमेश्वराला गीत गा, कारण तो विजयानें उन्नत
झाला आहे;
घोडा व राऊत त्यानें समुद्रांत उलथून
टाकिला आहे.
२२ नंतर मोशानें इस्राएल लोकांस तांबड्या
समुद्रापासून पुढें नेलें आणि ते शूर नांवाच्या वैराण
प्रदेशांत जाऊन पोहंचले; त्यांतून तीन दिवस कूच
करीत असतां त्यांस पाणी कोठें मिळेना. २३ मग
मारा नामक एका स्थळीं ते आले; तेथलें पाणी फार
खारें असल्यामुळें त्यांस तें पिववेना, म्हणून त्या
स्थलाचें नांव मारा असें पडलें. २४ तेव्हां आम्हीं
काय प्यावें असें म्हणून त्यांनीं मोशाजवळ कुरकुर केली.
२५ त्यानें परमेश्वराचा धावा केला तेव्हां त्यानें त्यास
एक वनस्पति दाखविली, ती त्यानें पाण्यांत टाकिल्या-
वर तें गोड झालें. तेथें त्यानें त्यांच्यासाठीं एक विधि
व नियम लावून दिला, त्यांस कसोटीस लाविलें
आणि म्हटलें, २६ तूं आपला देव परमेश्वर
याचें वचन मनःपूर्वक ऐकशील आणि त्याच्या
दृष्टीनें जें नीट तें करिशील, त्याच्या आज्ञांकडे
कान देशील आणि त्याचे सर्व विधि पाळशील तर
मिसरी लोकांवर ज्या व्याधि मीं पाठविल्या त्यांपैकीं
एकहि तुजवर पाठविणार नाहीं; कारण मी तुला
व्याधिमुक्त करणारा परमेश्वर आहें.
२७ मग ते एलीम येथें आले; त्या ठिकाणीं
पाण्याचे बारा झरे आणि सत्तर खजुरीचीं
झाडें होतीं; तेथें पाण्याजवळ त्यांनीं तळ दिला.

१६ १ मग एलीम येथून कूच करून इस्राएल
लोकांचा सर्व समुदाय मिसर देशांतून
निघाल्यावर दुसऱ्या महिन्याच्या पंधराव्या दिवशीं
एलीम आणि सीनाय यांच्यामधल्या सीन रानांत येऊन
पोहंचला. २ त्या रानांत इस्राएल लोकांच्या सर्व
मंडळीनें मोशे व अहरोन यांच्यासंबंधानें कुरकुर केली;
३ इस्राएल लोक त्यांस म्हणूं लागले कीं आम्हीं मिसर
देशांत मांसाच्या पात्रांवर बसून यथेष्ट भोजन

करीत होतों तेव्हां आम्हांस परमेश्वराच्या हातून मरण आलें असतें तर पुरवलें असतें, पण या सर्व समुदायास उपासानें मारावें म्हणून तुम्हीं आम्हांस ह्या रानांत आणिलें आहे.

४ तेव्हां परमेश्वरानें मोशाला म्हटलें, पाहा, मी आकाशांतून तुम्हांसाठीं अन्नवृष्टि करीन आणि ह्या लोकांनीं बाहेर जाऊन एकएका दिवसाला पुरेल इतकें जमा करावें; यावरून ते माझ्या नियमाप्रमाणें चालतात किंवा नाहीं याविषयीं मी त्यांची परीक्षा पाहीन. ५ सहाव्या दिवशीं जें कांहीं ते जमा करून शिजवितील तें इतर दिवशीं जमा करतील त्याच्या दुप्पट असावें. ६ मोशे आणि अहरोन सर्व इस्राएल लोकांस म्हणाले कीं परमेश्वरानेंच तुम्हांस मिसर देशांतून काढलें हें तुम्हांस संध्याकाळीं कळून येईल, ७ आणि सकाळीं परमेश्वराचें तेज तुमच्या दृष्टीस पडेल, कारण परमेश्वराविरुद्ध तुम्ही कुरकुर करीत आहां ती त्यानें ऐकली आहे; आम्ही कोण कीं तुम्हीं आम्हांविरुद्ध कुरकुर करावी? ८ मोशे म्हणाला, परमेश्वर तुम्हांस संध्याकाळीं मांस खावयास देईल व सकाळीं पोटभर भाकरी देईल तेव्हां पाहाल; कारण तुम्ही परमेश्वराविरुद्ध जी कुरकुर करितां ती त्यानें ऐकली आहे; आम्ही कोण आहों? तुमचें कुरकुरणें आम्हांविरुद्ध नव्हे तर परमेश्वराविरुद्ध आहे. ९ मोशे अहरोनास म्हणाला, इस्राएल लोकांच्या सर्व मंडळीस सांग कीं तुम्ही परमेश्वरासन्मुख या, कारण त्यानें तुमची कुरकुर ऐकली आहे. १० अहरोन इस्राएलाच्या सर्व मंडळीशीं बोलत असतां त्यांनीं रानाकडे नजर फिरविली, तों मेघांत परमेश्वराचें तेज दृष्टीस पडलें. ११ परमेश्वर मोशाला म्हणाला, १२ इस्राएल लोकांची कुरकुर मीं ऐकली आहे, त्यांस सांग कीं संध्याकाळीं तुम्ही मांस खाल आणि सकाळीं पोटभर भाकरी खाल, म्हणजे मी तुमचा देव परमेश्वर आहें हें तुम्हांस कळेल.

१३ संध्याकाळीं असें झालें कीं लावे येऊन सर्व छावणीभर पसरले आणि सकाळीं छावणीच्या चोहों बाजूंस दंव पडलें. १४ हें पडलेलें दंव सुकून गेलें तेव्हां त्या रानांतील सर्व भूमीवर खवल्यांसारखे हिमकणांएवढे सूक्ष्म रज पसरलेले नजरेस पडले. १५ इस्राएल लोक ते पाहून एकमेकांस म्हणाले, हें काय?[१] तें काय होतें तें त्यांस माहीत नव्हतें. मोशे त्यांस म्हणाला, परमेश्वरानें तुम्हांस खावयास दिलें आहे तें हेंच. १६ परमेश्वरानें आज्ञा केली आहे ती ही कीं प्रत्येकानें आपआपल्या आहाराप्रमाणें हें गोळा करावें; ज्याच्या त्याच्या डेऱ्यांत जेवढीं माणसें असतील तेवढ्यांसाठीं आपआपल्या माणसांच्या संख्येप्रमाणें प्रत्येकीं एकएक ओमर जमा करावें. १७ इस्राएल लोकांनीं तसें केलें; कोणीं कमी, कोणीं जास्त गोळा केलें. १८ त्यांनीं ओमरच्या मापानें तें मापून पाहिलें तेव्हां ज्यानें फार गोळा केलें होतें त्याचें अधिक भरलें नाहीं; तसेंच ज्यानें थोडें गोळा केलें होतें त्याचें कांहीं कमी भरलें नाहीं; प्रत्येकानें आपआपल्या आहाराच्या मानानें तें गोळा केलें होतें. १९ मोशानें त्यांस सांगितलें कीं कोणीहि यांपैकीं कांहींएक सकाळपर्यंत ठेवूं नये. २० तथापि त्यांच्यापैकीं कित्येकांनीं मोशाचें न ऐकतां त्यांतलें कांहीं सकाळपर्यंत ठेविलें तेव्हां त्यांत किडे पडून त्याची घाण येऊं लागली; त्यावरून मोशे त्यांच्यावर रागावला.

२१ या प्रकारें ते नित्य सकाळीं आपआपल्या आहाराप्रमाणें तें गोळा करीत; आणि उनाचा ताप वाढला म्हणजे तें वितळे. २२ सहाव्या दिवशीं त्यांनीं दुप्पट म्हणजे प्रत्येक माणशीं दोन ओमर गोळा केलें; तेव्हां त्या मंडळीच्या सर्व सरदारांनीं मोशाकडे येऊन त्यास हें कळविलें. २३ तो त्यांस म्हणाला, परमेश्वराचें सांगणें असें आहे कीं उद्यां विश्रामवार, परमेश्वराचा पवित्र शब्बाथ आहे; तुम्हांला भाजावयाचें तें भाजा आणि शिजवावयाचें तें शिजवा आणि जें कांहीं उरेल तें आपल्यासाठीं सकाळपर्यंत ठेवा. २४ मोशानें त्यांस सांगितल्याप्रमाणें त्यांनीं तें सकाळपर्यंत ठेविलें; पण त्याची घाण सुटली नाहीं किंवा त्यांत किडे पडले नाहींत. २५ मग मोशे म्हणाला, तें आज खा, कारण आज परमेश्वराचा

१ **अथवा:** मान्ना आहे; **मुळांत:** मानहू.

शब्बाथ आहे, आज रानांत तें तुम्हांस मिळावयाचें
नाहीं. २६ सहा दिवस तुम्हीं तें गोळा करावें;
सातवा दिवस शब्बाथ आहे, त्या दिवशीं कांहींएक
नसणार. २७ तरी सातव्या दिवशीं तें गोळा
करण्यासाठीं कांहीं लोक बाहेर गेले पण त्यांस कांहीं
मिळालें नाहीं. २८ तेव्हां परमेश्वरानें मोशाला म्हटलें,
माझ्या आज्ञा व माझे नियम पाळावयास तुम्ही कोठवर
अमान्य होणार? २९ पाहा, परमेश्वरानें तुम्हांस
शब्बाथ दिला आहे म्हणून सहाव्या दिवशीं तो तुम्हांस
दोन दिवसांचें अन्न देतो; सातव्या दिवशीं प्रत्येकानें
आपआपल्या स्थानीं स्वस्थ असावें, आपलें स्थान सोडून
कोणींहि बाहेर जाऊं नये. ३० याप्रमाणें लोकांनीं
सातव्या दिवशीं विसावा घेतला.

३१ इस्राएल लोकांनीं त्या अन्नाचें नांव मान्ना ठेविलें,
तें धण्यासारखें पांढरें असून त्याची चव मध घालून
केलेल्या पोळीसारखी होती. ३२ मोशे म्हणाला,
परमेश्वरानें अशी आज्ञा दिली आहे कीं यांतलें एक
ओमरभर पुढल्या पिढ्यांच्या लोकांसाठीं ठेवा; मी
तुम्हांस मिसर देशांतून काढून आणून रानांत कोणत्या
प्रकारचें अन्न दिलें हें त्यांस यावरून कळून येईल.
३३ तेव्हां मोशानें अहरोनास सांगितलें कीं एक पात्र
घेऊन त्यांत एक ओमरभर मान्ना घाल; तें तुमच्या
पुढील पिढ्यांसाठीं परमेश्वरासमोर राखून ठेवावयाचें
आहे. ३४ परमेश्वरानें मोशाला आज्ञा केल्याप्रमाणें तें
जतन करावें म्हणून आज्ञापटासमोर अहरोनानें ठेविलें.
३५ इस्राएल लोक वस्ती असलेल्या देशांत जाऊन
पोहंचत तोंपर्यंत चाळीस वर्षे मान्ना खात होते; कनान
देशाच्या सरहद्दीपर्यंत जाऊन पोहंचत तोंपर्यंत ते मान्ना
खात होते. ३६ ओमर हा एफाचा दहावा भाग आहे.

१ मग इस्राएल लोकांचा सर्व समुदाय
१७ सीन रानांतून निघाला; परमेश्वराच्या आज्ञे-
प्रमाणें मजल करून रफीदीम येथें त्यानें तळ
दिला; तेथें लोकांस प्यावयास पाणी मिळेना;
२ म्हणून लोक मोशाशीं भांडूं लागले व
म्हणाले, आम्हांस प्यावयास पाणी दे, तेव्हां मोशे
त्यांस म्हणाला, तुम्ही मजशीं कां भांडतां? परमे-
श्वराची परीक्षा कां पाहतां? ३ लोकांस पाण्याचा
शोष लागला तेव्हां ते कुरकुर करून मोशाला म्हणाले,
आम्हांस, आमच्या मुलांस व आमच्या गुरांढोरांस
तहानेनें मारून टाकण्यास तूं आम्हांस मिसर देशांतून
बाहेर कां काढिलें? ४ मोशानें परमेश्वराचा धावा
करून म्हटलें, या लोकांस मी काय करूं? हे तर मला
बहुतेक दगडमार करावयास तयार झाले आहेत.
५ परमेश्वर मोशाला म्हणाला, इस्राएलांतील कांहीं
वडील माणसें बरोबर घेऊन व तूं नील नदीवर
आपटलीस ती आपली काठी हातीं घेऊन लोकांच्या पुढें
चाल. ६ पाहा, होरेब गिरीवरील एका खडकावर
मी तुजपुढें उभा राहीन; तूं त्या खडकावर काठी
आपट; त्यांतून पाणी निघेल म्हणजे तें हे लोक
पितील. मोशानें इस्राएलांच्या वडिलांदेखत तसें केलें.
७ मोशानें त्या ठिकाणाचें नांव मस्सा (परीक्षा) आणि
मरीबा (कलह) असें ठेविलें, कारण इस्राएल लोकांनीं
तेथें कलह केला आणि परमेश्वर आमच्यामध्यें आहे
किंवा नाहीं असें म्हणून परमेश्वराची परीक्षा पाहिली.

८ मग अमालेक येऊन रफीदीम येथें इस्राएल
लोकांशीं लढूं लागला. ९ तेव्हां मोशानें यहोशवास
सांगितलें, आपल्यांतले कांहीं पुरुष निवडून काढ
आणि जाऊन अमालेकाशीं युद्ध कर; उद्यां मी देवाची
काठी हातीं घेऊन डोंगराच्या माथ्यावर उभा राहीन.
१० मोशाच्या सांगण्याप्रमाणें यहोशवानें केलें व तो
अमालेकाशीं लढूं लागला; मोशे, अहरोन आणि हूर
हे डोंगराच्या माथ्यावर गेले. ११ त्या समयीं असें
झालें कीं मोशे आपले हात वर करी तेव्हां इस्रा-
एलाची सरशी होई व तो आपले हात खालीं करी
तेव्हां अमालेकाची सरशी होई. १२ मोशाचे हात
भरून आले तेव्हां त्यांनीं एक धोंडा घेऊन मोशाच्या
खालीं ठेविला व तो त्यावर बसला आणि अहरोन व
हूर यांनीं दोहों बाजूंकडून त्याच्या हातांस टेका दिला;

१ मुळांतः मानहू

म्हणून सूर्य मावळेपर्यंत त्याचे हात स्थिर राहिले.
१३ मग यहोशवानें आपल्या तरवारीच्या धारेनें
अमालेकाचा व त्याच्या लोकांचा मोड केला.
१४ मग परमेश्वरानें मोशाला म्हटलें कीं याचें स्मरण
राहावें म्हणून ही गोष्ट एका ग्रंथांत लिहून ठेव आणि
यहोशवाच्या कानीं घाल; मी परमेश्वर अमालेकाची
नांवनिशाणी आकाशाखालून नाहींशी करणार. १५ तेथें
मोशानें एक वेदी बांधून तिचें नांव याव्हे–निस्सी
(परमेश्वर माझा ध्वज) असें ठेविलें; १६ आणि
तो म्हणाला, परमेश्वराच्या सिंहासनावर हात उचलिल्या-
मुळें परमेश्वराचें अमालेकाशीं पिढ्यानपिढ्या युद्ध होणार.

१८ १ देवानें मोशे व आपली प्रजा इस्राएल
यांच्यासाठीं काय काय केलें, परमेश्वरानें
इस्राएलांस मिसर देशांतून कसें बाहेर काढिलें
हें मोशाचा सासरा मिद्यानी याजक इथ्रो यानें ऐकलें.
२ मोशानें आपली स्त्री सिप्पोरा पूर्वी परत पाठविली
होती, तिला आणि तिच्या दोन पुत्रांला घेऊन मोशाचा
सासरा इथ्रो आला; ३ त्यांपैकीं एकाचें नांव मोशानें
गेर्षोम असें ठेविलें होतें, कारण तो म्हणाला, मी
परक्या देशांत प्रवासी आहें; ४ आणि दुसऱ्याचें
नांव त्यानें एलियेजर असें ठेविलें होतें, कारण तो
म्हणाला, माझ्या पित्याच्या देवानें माझें साहाय्य
करून मला फारोच्या तरवारीपासून बचाविलें आहे.
५ रानांत देवाच्या पर्वतापाशीं मोशाचा तळ होता
तेथें त्याचा सासरा इथ्रो त्याच्या स्त्रीस व मुलांस
घेऊन मोशाकडे आला; ६ आणि त्यानें मोशाला
सांगून पाठविलें कीं मी तुझा सासरा इथ्रो तुझी बायको
व तिचे दोन पुत्र घेऊन तुजकडे आलों आहें.
७ तेव्हां मोशे आपल्या सासऱ्यास सामोरा गेला
आणि त्याला दंडवत घालून त्यानें त्याचें चुंबन घेतलें;
एकमेकांचें क्षेमकुशल विचारल्यावर ते डेऱ्यांत गेले.
८ परमेश्वरानें इस्राएलांसाठीं फारोचें व मिसरी
लोकांचें काय केलें, वाटेनें त्यांस काय कष्ट भोगावे
लागले, आणि परमेश्वरानें त्यांची सोडवणूक कशी
केली हा सर्व वृत्तांत मोशानें आपल्या सासऱ्यास
निवेदन केला. ९ परमेश्वरानें इस्राएलांस मिसरी
लोकांच्या हातांतून सोडविलें यांत त्यानें त्यांचें कसें
बरें केलें तें ऐकून इथ्रो परम संतोष पावला.
१० इथ्रो म्हणाला, ज्यानें तुम्हांस मिसऱ्यांच्या व
फारोच्या हातांतून सोडविलें, ज्यानें आपल्या प्रजेस
मिसऱ्यांच्या तावडींतून मुक्त केलें, तो परमेश्वर धन्य
होय. ११ आतां मला कळून आलें आहे कीं सर्व देवांहून
परमेश्वर श्रेष्ठ आहे. ज्या गोष्टीसंबंधानें ते मिसरी
लोक इस्राएलांशीं ताठ्यानें वागले तिच्यासंबंधानेंहि
तो श्रेष्ठ आहे. १२ मग मोशाचा सासरा इथ्रो यानें
देवाप्रीत्यर्थ होमबलि अर्पिले व यज्ञ केले; आणि
अहरोन इस्राएलाच्या सर्व वडिलांसह मोशाचा सासरा
इथ्रो याजबरोबर देवासमोर भोजन करावयास आला.
१३ दुसरे दिवशीं मोशे लोकांचा न्यायइनसाफ
करावयास बसला; आणि सकाळपासून संध्याकाळपर्यंत
लोक मोशाभोंवतीं उभे होते. १४ मोशे लोकांसाठीं
कायकाय करितो हें त्याच्या सासऱ्यानें पाहिलें तेव्हां
तो म्हणाला, तूं लोकांसाठीं हें काय करितोस ? तूं
एकटाच बसतोस आणि सकाळपासून संध्याकाळपर्यंत
सर्व लोक तुझ्याभोंवतीं उभे राहतात तें कां ?
१५ मोशे आपल्या सासऱ्यास म्हणाला, लोक देवाला
प्रश्न विचारावयास मजकडे येतात; १६ त्यांचें कांहीं
प्रकरण असलें म्हणजे ते मजजवळ येतात, तेव्हां मी
त्यांचा आपसांत निवाडा करितों आणि देवाचे विधि व
नियम त्यांस विदित करितों. १७ मोशाचा सासरा
त्याला म्हणाला, तूं करितोस तें कांहीं ठीक नाहीं.
१८ तूं व तुझ्याजवळचे लोक हे तुम्ही अशानें शीण
पावाल; हें काम तुला फार भारी आहे, तुला
एकट्याला हें आटपावयाचें नाहीं. १९ तर आतां
माझें ऐक, मी तुला सल्ला देतों, आणि देव तुला साहाय्य
असो; या लोकांचा देवापाशीं तूं मध्यस्थ हो आणि
त्यांचीं प्रकरणें देवापाशीं ने; २० विधि व नियम
त्यांस शिकीव, आणि त्यांनीं कोणत्या मार्गानें चालावें
व कोणतें काम करावें हें त्यांस दाखवीत जा. २१ तूं
या सर्व लोकांतून' गुणवान्, देवाचें भय धरणारे,

सत्यप्रिय, अपहाराचा वीट मानणारे असे पुरुष
निवडून घे आणि त्यांस हजार हजार, शंभर शंभर,
पन्नास पन्नास, दहा दहा लोकांवर नायक नेमून ठेव;
२२ त्यांनीं लोकांचा नित्य न्यायइनसाफ करावा;
त्यांनीं सर्व मोठीं प्रकरणें तुजकडे आणावीं आणि
लहानसहान प्रकरणांचा त्यांनींच निकाल करावा; अशानें
तुझें काम हलकें होईल व ते तुझ्या भाराचे वांटेकरी
होतील. २३ तूं असें करिशील आणि देवाची
तुला अशी अनुज्ञा होईल तर तुझा या कामीं टिकाव
लागेल, आणि हे सर्व लोक स्वस्थानीं सुखानें जातील.
२४ मोशानें आपल्या सासऱ्याचे शब्द ऐकून त्याच्या
सांगण्याप्रमाणें सर्व कांहीं केलें. २५ त्यानें इस्राएलांतून
गुणवान् पुरुष निवडून त्यांस हजार हजार, शंभर
शंभर, पन्नास पन्नास, दहा दहा लोकांवर नायक नेमिले.
२६ ते लोकांचा नित्य न्यायइनसाफ करूं लागले;
एकादें प्रकरण कठीण असलें तर ते तें मोशाकडे
आणीत, पण लहानसहान प्रकरणाचा ते निकाल
करीत. २७ मग मोशानें आपल्या सासऱ्याची बोळवण
केली आणि तो आपल्या देशीं रवाना झाला.

१९ १ इस्राएल लोक मिसर देशांतून निघाल्यास
तीन महिने झाले त्याच दिवशीं ते सीनायच्या
रानांत येऊन पोहंचले. २ रफीदीन येथून
निघाल्यावर इस्राएल लोक कूच करीत सीनायच्या
रानांत आले; तेथें त्यांनीं डेरे दिले, पर्वतासमोर
त्यांनीं तळ दिला. ३ तेव्हां मोशे पर्वत चढून
देवाकडे गेला; परमेश्वरानें त्याला पर्वतावरून हाक
मारून सांगितलें कीं याकोबवंशास हें सांग, इस्राएल
लोकांस हें विदित कर : ४ मिसऱ्यांचें मीं काय केलें तें
व तुम्हांस जसे काय गरुडाच्या पंखांवर बसवून मीं
आपणाकडे कसें आणिलें आहे हें तुम्हीं पाहिलें
आहे; ५ म्हणून आतां तुम्ही खरोखर माझी वाणी
ऐकाल आणि माझा करार पाळाल तर सर्व लोकांमध्यें
माझा खास निधि व्हाल; सर्व पृथ्वी माझी
आहे; ६ पण तुम्ही मला याजकराज्य, पवित्र राष्ट्र
व्हाल. तुला इस्राएल लोकांस सांगावयाचें तें हेंच.

७ मोशानें येऊन लोकांच्या वडिलांस बोलाविलें आणि
परमेश्वरानें जीं वचनें त्यांस निवेदन करण्याची आज्ञा
केली होती तीं सर्व त्यानें त्यांच्यापुढें मांडिलीं. ८ तेव्हां
सर्व लोक मिळून म्हणाले, परमेश्वरानें सांगितलें आहे
तें सर्व आम्ही करूं. मोशानें लोकांचा हा जबाब
परमेश्वराला सादर केला. ९ मग परमेश्वर मोशाला
म्हणाला, पाहा, मी घनमेघांत तुजजवळ येतों, म्हणजे
मी तुजशीं बोलेन तें लोकांच्या कानीं पडेल आणि
मग त्यांचा सर्वदा तुजवरहि विश्वास बसेल. मोशानें
लोकांचें म्हणणें परमेश्वराला विदित केलें. १० परमेश्वर
मोशाला म्हणाला, तूं लोकांकडे जा आणि त्यांस आज
आणि उद्यां पवित्र कर, आणि त्यांना आपलीं वस्त्रें
धुवावयास सांग; ११ तिसरा दिवस येई तोंवर त्यांनीं
तयार राहावें, कारण तिसऱ्या दिवशीं सर्व लोकांदेखत
परमेश्वर सीनाय पर्वतावर उतरेल. १२ तूं लोकांसाठीं
सभोवतालीं मर्यादा आंखून लोकांस सांग, संभाळा,
पर्वतावर चढूं नका, त्याच्या सीमेला शिवूं देखील
नका, जो कोणी पर्वतास स्पर्श करील तो खास
आपल्या जिवास मुकेल; १३ कोणीं आपला हात
त्यास लावूं नये, लाविला तर त्याला दगडमार करावा
किंवा बाणांनीं विंधावें; तो पशु असो किंवा मनुष्य
असो, त्याला जीवंत ठेवूं नये; शिंगाचा दीर्घ नाद होईल
तेव्हां लोकांनीं पर्वतापाशीं यावें. १४ मोशे पर्वता-
वरून उतरून लोकांकडे खालीं आला; त्यानें लोकांस
पवित्र केलें आणि त्यांनीं आपलीं वस्त्रें धुतलीं.
१५ त्यानें लोकांस सांगितलें कीं तिसरा दिवस येई तोंवर
तयार असा, स्त्रीस्पर्श करूं नका.

१६ तिसरा दिवस उजाडतांच मेघगर्जना झाला व
विजा चमकूं लागल्या, पर्वतावर घनमेघ आले व प्रचंड
शिंगाचा नाद होऊं लागला तेव्हां छावणींतले सर्व लोक
थरथरां कांपूं लागले. १७ मोशानें लोकांस देवाच्या दर्शना-
साठीं छावणींतून बाहेर आणिलें; आणि ते पर्वताच्या
तळाजवळ उभे राहिले. १८ परमेश्वर अग्नीच्या ठायीं
सीनाय पर्वतावर उतरला म्हणून तो सर्व धूममय झाला,

भट्टीच्या धुरासारखा त्याचा धूर वर चढला व सर्व
पर्वत थरथरूं लागला. १९ रणशिंगाचा शब्द अधिक
अधिक होत गेला, तेव्हां मोशे बोलूं लागला आणि
देव त्याला आपल्या वाणीनें उत्तर देत गेला.
२० परमेश्वरानें पर्वताच्या शिखरावर उतरून मोशाला
सीनाय पर्वताच्या शिखरावर बोलाविलें, तेव्हां तो वर
गेला. २१ परमेश्वर मोशाला म्हणाला, खालीं जाऊन
लोकांस ताकीद दे, नाहीं तर ते मर्यादा ओलांडून
काय आहे तें पाहावयास परमेश्वर आहे तिकडे
यावयाचे व त्यांच्यापैकीं बहुतेक मरावयाचे.
२२ तसेंच परमेश्वरासमोर वावरणाऱ्या याजकांनींहि
पवित्र व्हावें, नाहींतर परमेश्वर त्यांस ताडण
करील. २३ मोशे परमेश्वरास म्हणाला, लोकांना
सीनाय पर्वतावर येववणार नाहीं, कारण तूंच आम्हांस
ताकीद दिली व मला सांगितलें कीं पर्वताभोंवतीं
मर्यादा घाल व तो अधिक पवित्र कर. २४ तेव्हां
परमेश्वर त्याला म्हणाला, तूं उतरून खालीं जा, नंतर
तूं व तुझ्याबरोबर अहरोनानें वर यावें; याजकांनीं व
लोकांनीं मर्यादा उल्लंघून परमेश्वर आहे तिकडे येतां
कामा नये; आले तर त्यांस परमेश्वर ताडण करील.
२५ मग मोशानें खालीं जाऊन लोकांला हें सांगितलें.

## २०

१ देवानें हीं सर्व वचनें सांगितलीं :
२ ज्यानें तुला मिसर देशांतून, दास्यगृहांतून
काढिलें तो मी परमेश्वर तुझा देव आहें.
३ माझ्यासमोर तुला अन्य देव नसावे.
४ आपल्यासाठीं कोरींव मूर्ति करूं नको; वर
आकाशांतील, खालीं पृथ्वीवरील व पृथ्वीखालच्या
जलांतील कशाचीहि प्रतिमा करूं नको. ५ त्यांच्या
पायां पडूं नको किंवा त्यांची पूजा करूं नको; कारण मी
परमेश्वर तुझा देव ईर्ष्यावान् देव आहें; जे मजशीं
विरोध करितात त्यांच्या मुलांस तिसऱ्या चौथ्या
पिढीपर्यंत वडिलांच्या अन्यायाबद्दल शासन करितों;
६ आणि जे मजवर प्रेम करितात व माझ्या आज्ञा
पाळितात अशांच्या हजारों जणांवर मी दया करितों.
७ तुझा देव परमेश्वर याचें नाम व्यर्थ घेऊं नको,
कारण जो परमेश्वराचें नाम व्यर्थ घेईल त्याची तो
गय करणार नाहीं.
८ शब्बाथ दिवसाची आठवण ठेवून तो पवित्रपणें
पाळ. ९ सहा दिवस श्रम करून आपलें सर्व
कामकाज कर; १० पण सातवा दिवस तुझा देव
परमेश्वर याचा शब्बाथ आहे; त्या दिवशीं कोणतेंहि
कामकाज करूं नको; तूं, तुझा पुत्र, तुझी कन्या, तुझा
दास, तुझी दासी, तुझे पशु, किंवा तुझ्या वेशींच्या
आंत असलेला विदेशी यानेंहि करूं नये; ११ कारण
सहा दिवसांत परमेश्वरानें आकाश, पृथ्वी, समुद्र व
त्यांतील सर्व कांहीं निर्माण केलें आणि सातव्या
दिवशीं विश्रांति घेतली; म्हणून परमेश्वरानें शब्बाथ
दिवस आशीर्वाद देऊन पवित्र असा ठरविला.
१२ आपला बाप व आपली आई यांचा मान
राख, म्हणजे जो देश तुझा देव परमेश्वर तुला देत
आहे त्यांत तूं चिरकाळ राहशील.
१३ खून करूं नको.
१४ व्यभिचार करूं नको.
१५ चोरी करूं नको.
१६ आपल्या शेजाऱ्याविरुद्ध खोटी साक्ष देऊं नको.
१७ आपल्या शेजाऱ्याच्या घराचा अभिलाष करूं
नको, आपल्या शेजाऱ्याच्या स्त्रीचा अभिलाष करूं नको,
आपल्या शेजाऱ्याचा दास, दासी, बैल, गाढव, अथवा
त्याची कोणतीहि वस्तु यांचा अभिलाष करूं नको.
१८ मेघगर्जना होत आहे, विजा चमकत आहेत,
कर्ण्याचा शब्द होत आहे आणि पर्वतांतून धूर चढत
आहे असें सर्व लोकांच्या दृष्टीस पडलें, हें पाहून त्यांचा
थरकांप झाला व ते दूर उभे राहिले. १९ ते मोशाला
म्हणूं लागले, आम्हांशीं तूंच बोल, आणि आम्ही ऐकूं;
देव आम्हांशीं न बोलो, तो बोलला तर आम्ही मरूं.
२० मोशानें लोकांस सांगितलें, भिऊं नका, कारण
तुमची परीक्षा करावी आणि त्याचें भय तुमच्या

१ पाठभेद : लोक.

१ अथवा : पिढ्यांवर ( अनु. ७ : ९ पाहा. )

६

डोळ्यांपुढें राहून तुम्हीं पाप करूं नये यासाठीं देव आला आहे. २१ लोक दूर उभे राहिले पण देव निबिड अंधकारांत होता तिकडे मोशे गेला.

२२ तेव्हां परमेश्वर मोशाला म्हणाला, तूं इस्राएल लोकांस असें सांग, मीं तुम्हांशीं आकाशांतून भाषण केलें तें तुम्हीं प्रत्यक्ष पाहिलें आहे. २३ तुम्ही माझ्या बरोबरीला दुसरे देव करूं नका; आपल्यासाठीं सोन्यारुप्याचे देव करूं नका. २४ माझ्यासाठीं एक मातीची वेदी करा आणि तिजवर शेरडांमेंढरांचे व गुरांढोरांचे होम आणि शांत्यर्पणें करा; जेथेंजेथें माझें नामस्मरण व्हावें असें मी करीन तेथेंतेथें मीं येऊन तुम्हांस आशीर्वाद देईन. २५ तुम्ही माझ्यासाठीं दगडांची वेदी बांधाल तर ती घडलेल्या चिऱ्यांची नसावी, कारण तुम्हीं आपलें हत्यार दगडाला लाविल्यास तो भ्रष्ट होईल. २६ तुझ्या शरीराची नग्नता माझ्या वेदीवर दिसून येऊं नये म्हणून तूं पायऱ्यांनीं चढतां कामा नये.

**२१** १ आतां जे नियम तूं त्यांस लावून द्यावे ते हे :—

२ तूं एकादा इब्री गुलाम विकत घेतला तर त्यानें सहा वर्षें काम करावें आणि सातव्या वर्षी त्याच्याबद्दल कांहीं खंड न घेतां त्यास जाऊं द्यावें. ३ तो सडाच आला असला तर त्यानें सडेंच मुक्त होऊन जावें, तो स्त्रीसहित आला असला तर त्याच्या स्त्रीनेंहि त्याच्याबरोबर मुक्त होऊन जावें. ४ त्याच्या धन्यानें त्यास बायको करून दिली असली व तिला पुत्र व कन्या झाल्या असल्या तर ती व तिचीं मुलें धन्याचीं; त्यानें एकट्यानेंच जावें. ५ पण जर तो दास निक्षून म्हणूं लागला कीं माझ्या धन्यावर व माझ्या बायकोमुलांवर माझें प्रेम आहे, मला मुक्त होऊन जाण्याची इच्छा नाहीं, ६ तर त्याच्या धन्यानें त्यास देवासमोर[1] आणून दारापाशीं किंवा दाराच्या चौकटीपाशीं उभें करावें व आरीनें त्याचा कान टोंचावा म्हणजे तो त्याचें निरंतर दास्य करील.

७ कोणीं आपली कन्या दासी म्हणून विकिली तर ती दासांप्रमाणें मुक्त होऊन जातां कामा नये. ८ तिचा धनी तिला आपली स्त्री करून घेणार असून पुढें तिच्यावरून त्याची मर्जी उडाली तर त्यानें खंड घेऊन तिची सुटका करावी; तिजशीं त्यानें कपट केल्यामुळें परक्या लोकांस तिला विकून टाकण्याचा त्याला अधिकार नाहीं. ९ तिला आपल्या पुत्रासाठीं ठेवावयाची असल्यास त्यानें तिला कन्येप्रमाणें वागवावें. १० त्यानें दुसरी बायको केली तरी अन्नवस्त्र व व्यवहार यांत तिला कांहीं कमी पडूं देऊं नये. ११ या तिन्ही गोष्टी तो करीत नसल्यास कांहीं खंड न देतां तिनें मुक्त होऊन जावें.

१२ कोणीं एकाद्यास ताडण केलें व त्यानें तो मेला तर त्याला मरणदंड झालाच पाहिजे. १३ एकाद्याचा घात करण्याच्या इरादानें कोणीं टपून बसला नसून देवानें त्याला त्याच्या हातीं दिलें तर त्याला पळून जाण्यासाठीं मी तुला एक स्थान नेमून देतों; १४ पण जर कोणीं बुद्ध्या कोणावर चालून जाऊन त्याचा कपटानें घात केला तर त्याचा वध करण्यासाठीं माझ्या वेदीजवळून देखील त्याला घेऊन जावें.

१५ कोणीं आपल्या पित्यास अगर मातेस ताडण केलें तर त्यास अवश्य जिवें मारावें.

१६ एकाद्या मनुष्यास चोरून घेऊन त्याचा विक्रय कोणी करील किंवा त्याच्यापाशीं तो सांपडेल तर त्यास अवश्य जिवें मारावें.

१७ कोणीं आपल्या पित्यास किंवा मातेस शिव्याशाप दिले तर त्यास अवश्य जिवें मारावें.

१८ दोन माणसें झगडत असतां एकानें दुसऱ्यास धोंडा मारिला किंवा बुक्का मारिला व त्यामुळें तो मेला नाहीं, पण केवळ त्यास अंथरूण धरावें लागलें, १९ आणि तो उठून, काठी धरून हिंडूंफिरूं लागला तर मारणाऱ्यास सोडून द्यावें, मात्र तो घरीं बसल्याबद्दल त्याचें झालेलें नुकसान त्यानें भरून द्यावें आणि त्याला त्यानें अगदीं साफ बरें करवावें.

२० कोणीं आपल्या दासास अगर दासीस काठीनें

[1] अथवा : न्यायाधीशांसमोर.

मारिलें व मारतांमारतां तो मरण पावला तर त्याला अवश्य शिक्षा व्हावी; २१ पण तो एकदोन दिवस जिवंत राहिला तर धन्यास दंड करूं नये; कारण तो त्याचेंच धन होय.

२२ कोणी आपसांत मारामारी करीत असतां एकाद्या गर्भवती स्त्रीला धक्का लागून तिचा गर्भपात झाला, पण तिला दुसरी कांहीं इजा पोंचली नाहीं तर त्या स्त्रीचा पति सांगेल तो दंड त्याला करावा, आणि न्यायाधीशांच्या अनुमतानें त्यानें तो भरावा; २३ पण दुसरी कांहीं इजा झाल्यास जिवाबद्दल जीव, २४ डोळ्याबद्दल डोळा, दांताबद्दल दांत, हाताबद्दल हात, पायाबद्दल पाय, २५ डागण्याबद्दल डागणें, जखमेबद्दल जखम, फटक्याबद्दल फटका, असा बदला घ्यावा.

२६ जर कोणीं प्रहार करून आपल्या दासाचा अथवा दासीचा डोळा फोडिला तर तो डोळा गेल्यामुळें त्यानें त्याला दास्यमुक्त करावें; २७ आणि जर कोणीं प्रहार करून आपल्या दासाचा अथवा दासीचा दांत पाडून टाकिला तर तो दांत गेल्यामुळें त्यानें त्याला दास्यमुक्त करावें.

२८ एकाद्या बैलानें कोणा पुरुषास अथवा स्त्रीस हुंदडून जिवें मारिलें तर त्या बैलास दगडमार करून जिवें मारावें, व त्याचें मांस कोणीं खाऊं नये; गुराच्या धन्याला मात्र सोडून द्यावें. २९ तथापि त्या बैलाला हुंदडण्याची संवयच असली आणि त्याच्या धन्याला त्याबद्दल सूचना केली असूनहि त्यानें त्याला बांधून ठेविलें नाहीं, आणि तदनंतर त्या बैलानें कोणा पुरुषास अथवा स्त्रीस मारून टाकिलें तर त्यास दगडमार करावा आणि त्याच्या धन्यास॰ जिवें मारावें. ३० त्याच्या जिवाबद्दल खंड मागितल्यास त्यानें आपला प्राण बचावण्यासाठीं जो कांहीं खंड मागितला असेल तो द्यावा. ३१ बैलानें एकाद्याच्या पुत्राला किंवा कन्येला हुंदडून मारिलें तरीहि हाच न्याय त्याला लागू करावा. ३२ जर बैलानें कोणाच्या दासाला किंवा दासीला हुंदडून मारिलें तर त्या बैलाच्या धन्यानें त्यांच्या धन्याला तीस शेकेल रुपें द्यावें आणि त्या बैलास दगडमार करावा.

३३ कोणा मनुष्यानें बुजलेला खाडा उकरिला किंवा नवा खाडा खणिला आणि त्यावर झांकण न घातल्यामुळें त्यांत कोणाचा बैल अथवा गाढव पडला, ३४ तर खाड्याच्या मालकानें झालेली हानि भरून द्यावी, जनावराच्या धन्यास त्याचें मोल द्यावें आणि मेलेलें जनावर खाड्याच्या मालकाचें व्हावें.

३५ एकाद्याच्या बैलानें दुसऱ्याच्या बैलास दुखापत करून मारून टाकिलें तर जिवंत राहिलेला बैल विकून त्याचा पैका दोघां मालकांनीं सारखा वांटून घ्यावा; मेलेला बैलहि वांटून घ्यावा; ३६ पण बैल पूर्वीपासून मारका आहे हें ठाऊक असून धन्यानें त्यास बांधून ठेविलें नाहीं तर त्यानें बैलाबद्दल बैल द्यावा आणि मेलेला बैल त्याचा व्हावा.

## २२

१ एकाद्या मनुष्यानें बैल अथवा मेंढरूं चोरून तें कापिलें किंवा विकून टाकिलें तर त्यानें बैलाबद्दल पांच बैल आणि मेंढराबद्दल चार मेंढरें द्यावीं. २ चोर घर फोडीत असतां सांपडला व तो ठार मरेल असा त्याला मार बसला तर त्याच्या खुनाचा गुन्हा कोणास लागावयाचा नाहीं; ३ पण तो चोरी करीत असतां सूर्योदय झाला तर मारणाऱ्याला खुनाचा दोष लागेल; चोरानें नुकसान भरून द्यावें; तो कंगाल असल्यास चोरीच्या भरपाईसाठीं त्याची विक्री करावी. ४ चोरलेला बैल, गाढव, मेंढरूं वगैरे चोराच्या हातीं जिवंत सांपडलें तर त्यानें एकेकाबद्दल दोन दोन द्यावीं.

५ कोणीं दुसऱ्याचें शेत अथवा द्राक्षमळा खावविला, म्हणजे आपलें जनावर मोकळें सोडिलें, आणि त्यानें दुसऱ्याचें शेत खाल्लें तर आपल्या शेतांतील आणि आपल्या द्राक्षमळ्यांतील उत्तमोत्तम उपज देऊन त्याचें नुकसान त्यानें भरून द्यावें.

६ आग भडकून कांटेकुटे पेटले आणि त्यामुळें धान्याच्या सुड्या, उभें पीक अथवा शेत जळून गेलें तर ज्यानें आग पेटविली असेल त्यानें नुकसान भरून दिलेंच पाहिजे.

७ कोणीं शेजाऱ्यापाशीं पैका किंवा कांहीं जिनस

ठेवावयास दिला आणि त्याच्या घरून तो चोरीस गेला, तर चोर सांपडल्यास त्याच्या दुप्पट बदला चोरानें द्यावा; ८ पण चोर न सांपडला तर घराच्या मालकास देवासमोर[1] घेऊन जावें, म्हणजे त्यानें आपल्या शेजाऱ्याच्या मालमत्तेस स्वतः हात लाविला किंवा नाहीं याचा निर्णय होईल. ९ कारण कोणत्याहि प्रकारची आगळीक घडली, मग ती बैल, गाढव, मेंढरूं, वस्त्र, अथवा कोणतीहि गमावलेली वस्तु हिच्यासंबंधाची असो, तर ती माझी आहे अशी कोणीं तक्रार केल्यास दोघांचें प्रकरण देवासमोर यावें व ज्यास देव[2] दोषी ठरवील त्यानें आपल्या शेजाऱ्यास तिच्याबद्दल दुप्पट बदला द्यावा.

१० कोणीं दुसऱ्यापाशीं गाढव, बैल, मेंढरूं अथवा दुसरें कोणतेंहि जनावर राखणीस ठेविलें आणि जर तें मेलें अथवा त्यास कांहीं इजा झाली किंवा कोणीं तें कोणाच्या दृष्टीस न पडतां हाकून नेलें, ११ तर त्या दोघांच्या दरम्यान परमेश्वराची आणभाक होऊन आपण दुसऱ्याच्या वस्तूस हात लाविला नाहीं असें राखणाऱ्यानें म्हटल्यास त्या वस्तूच्या मालकानें तें खरें मानावें; मग त्याला भरपाई करून द्यावी लागणार नाहीं. १२ त्याजपासून तें वास्तविक चोरीस गेलें असलें तर त्यानें मालकाची भरपाई करावी. १३ तें जनावर जर कोणीं फाडून टाकिलें असलें तर त्यानें तें पुराव्यादाखल आणावें; त्याला भरपाई करून द्यावी लागणार नाहीं.

१४ कोणीं आपल्या शेजाऱ्यापासून कोणतेंहि जनावर मागून घेतलें असून त्याचा धनी बरोबर नसतां त्यास दुखापत झाली अथवा तें मरून गेलें तर त्यानें त्या धन्याला त्याची भरपाई अवश्य करून दिली पाहिजे; १५ पण त्याचा धनी बरोबर असला तर त्याची भरपाई करावी लागणार नाहीं; तें भाड्यानें घेतलें असलें तर त्याचें नुकसान भाड्यांतच आलेलें असतें.

१६ वाग्दान झालें नाहीं अशा कुमारीस फुसलावून कोणा पुरुषानें तिजशीं गमन केलें तर त्यानें देज देऊन तिजशीं विवाह करावा; १७ पण तिचा बाप तिला देण्यास मुळींच राजी नसला तर कुमारीबद्दल देज देण्याच्या वहिवाटीप्रमाणें त्या पुरुषानें पैसा तोलून द्यावा.

१८ चेटकिणीस जिवंत ठेवूं नये.

१९ पशुगमन करणाऱ्यास अवश्य जिवें मारावें.

२० जो कोणी परमेश्वरास सोडून इतर कोणत्याहि दैवतास बलि अर्पील त्याचा अगदीं संहार करावा. २१ कोणा उपऱ्यास छळूं नको किंवा त्याजवर जुलूम करूं नको, कारण मिसर देशांत तुम्हीहि उपरी होतां. २२ कोणा विधवेस किंवा पोरक्यास गांजूं नका. २३ तुम्हीं त्यांस कोणत्याहि प्रकारें गांजिलें आणि त्यांनीं मजकडे गिल्ला केला तर मी त्यांचें गाऱ्हाणें ऐकेनच ऐकेन; २४ आणि मग माझा राग भडकून मी तरवारीनें तुमचा संहार करीन; तुमच्या स्त्रिया विधवा व तुमचीं बालकें पोरकीं होतील.

२५ तुझ्याजवळ राहणाऱ्या माझ्या लोकांपैकीं कोणी कंगाल असला व तूं त्यास पैसे उसने दिले तर तूं त्याजशीं सावकाराप्रमाणें वागूं नको व त्याजपासून व्याज घेऊं नको. २६ तूं आपल्या शेजाऱ्याचें पांघरूण गहाण ठेवून घेतलें तर सूर्यास्त होण्यापूर्वी त्याचें त्याला परत दे; २७ कारण त्याचें तें एकच पांघरूण असून त्याचें अंग झांकण्यास तेवढेंच असणार; तर तो काय पांघरून निजेल? त्यानें मजकडे गाऱ्हाणें केलें तर मी त्याचें ऐकेन, कारण मी करुणामय आहें.

२८ तूं देवास[1] दूषण देऊं नको व आपल्या लोकनियंत्याला शिव्याशाप देऊं नको. २९ आपल्या शेताचा उपज व आपल्या फळांचे रस यांतून कांहीं मला अर्पिण्याची हयगय करूं नको. तूं आपल्या पुत्रांपैकीं प्रथम जन्मलेला मला द्यावा. ३० तसेंच बैल व मेंढरें यांचेहि प्रथमवत्स मला द्यावे; सात दिवसपर्यंत त्या वत्सानें आपल्या आईबरोबर असावें; आठव्या दिवशीं तूं तो मला द्यावा. ३१ तुम्ही माझे पवित्र लोक व्हा;

१ **अथवा :** न्यायाधीशांसमोर. २ **अथवा :** न्यायाधीश.

१ **अथवा :** न्यायाधीशांस.

म्हणून रानांत फाडून टाकिलेल्या पशूचें मांस तुम्हीं खाऊं नये; तें कुत्र्यांस घालावें.

## २३

१ खोटी अफवा उठवूं नको; अपराध्याच्या हातांत हात घालून द्रोही साक्षी होऊं नको. २ दुष्कर्म करण्यास प्रवृत्त होणाऱ्या बहुजनसमाजास अनुसरूं नको आणि बहुजनसमाजास अनुसरून एकाद्या मुकदम्यांत विपरीत न्याय व्हावयासाठीं साक्षी देऊं नको; ३ गरिबाचा दावा असला तरी त्याचा पक्ष घेऊं नको.

४ आपल्या शत्रूचा बैल अथवा गाढव मोकार फिरतांना तूं पाहिला तर त्यास अवश्य वळवून त्याजकडे पोंचता कर. ५ तूं आपल्या वैऱ्याचा गाढव बोजाच्या भाराखालीं दबलेला पाहिला तर त्याला उठविण्याचें त्या एकट्यावर टाकून जाऊं नको, तर त्याला साहाय्य करून त्याची अवश्य सुटका कर.

६ तुझ्या लोकांपैकीं जो कंगाल असेल त्याच्या मुकदम्याचा निवाडा विपरीत करूं नको. ७ खोट्या मुकदम्यापासून दूर राहा; निरपराधी व धार्मिक यांचा वध करूं नको, कारण दुष्टास मी निर्दोष ठरविणार नाहीं. ८ लांच घेऊं नको, कारण लांच डोळसांस अंध बनविते आणि धार्मिकांच्या म्हणण्याचा विपर्यास करिते. ९ कोणा उपऱ्यावर जुलूम करूं नको, कारण त्याची मनोभावना कशी असते हा तुम्हांस अनुभव आहे; कारण तुम्हीहि मिसर देशांत उपरी होतां.

१० सहा वर्षें आपली भूमि पेर आणि तिचें उत्पन्न सांठीव; ११ पण सातव्या वर्षी तिला विसावा मिळून ती पडीत राहूं दे, म्हणजे तुझ्या लोकांपैकीं कंगाल असतील ते तींत उगवलेलें खातील व त्यांनीं खाऊन जें उरेल तें वनपशु खातील. तुझे द्राक्षमळे व जैतूनवनें यांविषयींहि तसेंच कर. १२ सहा दिवस तूं आपला उद्योग कर व सातव्या दिवशीं विश्रांति घे, म्हणजे तुझे बैल आणि गाढव यांस विसावा मिळेल आणि तुझ्या दासींची संतति आणि विदेशी यांचा जीव ताजातवाना होईल, १३ मीं जें कांहीं तुम्हांस सांगितलें आहे त्या सगळ्याविषयीं सावध राहा; इतर देवांचें नांव देखील घेऊं नका, त्याचा नामोच्चारहि तुमच्या मुखांतून ऐकूं न यावा.

१४ वर्षांतून तीनदां तूं मजप्रीत्यर्थ मेळा भरवून सण कर. १५ बेखमीर भाकरीचा सण पाळ; त्या सणांत माझ्या आज्ञेप्रमाणें अबीब महिन्यांतील नेमिलेल्या समयीं सात दिवस तूं बेखमीर भाकरी खा, कारण त्याच महिन्यांत तूं मिसर देशांतून बाहेर निघालास; कोणीं रिक्तहस्तें माझ्या दर्शनास येऊं नये; १६ शेतांत पेरिलेल्या धान्याचें पहिलें पीक तयार होईल तेव्हां तूं कापणीचा सण पाळ आणि वर्षअखेर तूं आपल्या शेतांतील श्रमफलाचा संग्रह करिशील तेव्हां संग्रहाचा सण पाळ. १७ वर्षांतून तीनदां तुझ्यांतल्या सर्व पुरुषांनीं परमेश्वर देवाचें दर्शन घ्यावें.

१८ माझ्या यज्ञपशूचें रक्त[1] खमिराच्या भाकरीबरोबर अर्पूं नये; आणि मजप्रीत्यर्थ केलेल्या उत्सवांतील वपा[2] सकाळपर्यंत राहूं देऊं नये. १९ आपल्या भूमीच्या प्रथम उत्पन्नांतील पहिला भाग आपला देव परमेश्वर याच्या मंदिरांत तूं आणावा. कोकरूं त्याच्या आईच्या दुधांत शिजवूं नये.

२० पाहा, मी एक दूत तुझ्यापुढें पाठवीत आहें, तो वाटेनें तुझें संरक्षण करील आणि जें स्थान मीं तयार केलें आहे तेथें तुला पोंचवील. २१ त्याच्यासमोर तुम्ही सावधगिरीनें राहून त्याचें सांगणें माना; त्याची अवज्ञा करूं नका; कारण तो तुमचा अपराध माफ करणार नाहीं; त्याच्या ठायीं माझें नाम आहे. २२ तथापि तूं खरोखर त्याचें म्हणणें ऐकशील व मी सांगतों तें सगळें करिशील तर मी तुझ्या शत्रूंचा शत्रु, तुझ्या विरोध्यांचा विरोधी होईन. २३ माझा दूत तुझ्यापुढें चालून तुला अमोरी, हित्ती, परिज्जी, कनानी, हिव्वी व यबूसी लोकांकडे नेईल आणि मी त्यांचा उच्छेद करीन. २४ त्यांच्या देवांस तूं नमन करूं नये, त्यांची उपासना करूं नये आणि त्यांच्यासारखीं कर्में करूं नये, तर त्यांचा अगदीं विध्वंस करावा आणि त्यांच्या स्तंभांचे तुकडे तुकडे करावे.

१ निर्गम ५ : १ पाहा.

२ म्हणजे मेद किंवा चरबी.

२५ तूं आपला देव परमेश्वर याची उपासना करावी
म्हणजे तो तुझ्या अन्नपाण्यास बरकत देईल आणि तुझ्यां-
तली रोगराई दूर करील. २६ तुझ्या देशांत कोणाचा
गर्भपात होणार नाहीं किंवा कोणी वांझ असणार नाहीं
आणि मी तुला पुरें आयुष्य देईन. २७ ज्या ज्या लोकांत
तूं जाशील त्यांस मी आधींच आपली दहशत घालून
घाबरे करीन आणि तुझे सर्व शत्रु तुला पाठ
दाखवितील असें करीन. २८ मी तुझ्यापुढें गांधील-
माशा पाठवीन; त्या हिव्वी, कनानी, आणि हित्ती
यांस तुझ्यापुढून पळावयास लावितील. २९ मी त्या
सर्वांस एका वर्षाच्या अवधींतच घालवून देणार नाहीं;
तसें केल्यास देश उजाड होईल आणि वनपशु फार
होऊन तुला उपद्रव देतील. ३० तुझी वृद्धि होऊन तूं
देशाचा ताबा घेई तोंवर मी हळूहळू तुझ्यापुढून
त्यांस घालवीन. ३१ तांबड्या समुद्रापासून ते
पलिष्ट्यांच्या समुद्रापर्यंत आणि रानापासून ते फरात
नदापर्यंत तुझ्या देशाची मी सरहद्द करीन; त्या देशांतील
लोक तुझ्या काबूंत आणीन व तूं त्यांस आपल्या-
पुढून हाकून देशील ३२ तूं त्यांच्याशीं किंवा त्यांच्या
देवांशीं कांहीं करार करूं नको. ३३ ते तुझ्या देशांत
राहतां कामा नयेत; राहिल्यास ते तुला मजविरुद्ध पाप
करावयास लावितील; कारण तूं त्यांच्या देवांची
उपासना करिशील व ते तुला खात्रीनें पाशासारखे होतील.

२४ १ मग तो मोशास म्हणाला, तूं, अहरोन,
नादाब, अबीहू आणि इस्राएलांच्या वडिलां-
पैकीं सत्तर जण असे मिळून परमेश्वराकडे वर
चढून येऊन त्याला दुरून दंडवत घाला; २ एकट्या
मोशानें मात्र परमेश्वरासमीप यावें; बाकीच्यांनीं
समीप येऊं नये. इतर लोकांनीं तर त्याच्याबरोबर
चढून वर येऊंहि नये. ३ मग मोशानें लोकांपाशीं
जाऊन परमेश्वराचीं सर्व वचनें आणि सर्व नियम
त्यांस सांगितले, तेव्हां सर्व लोक एकस्वरानें म्हणाले
कीं जीं वचनें परमेश्वरानें सांगितलीं त्या सगळ्यां-
प्रमाणें आम्ही वर्तूं. ४ मोशानें परमेश्वराचीं सर्व वचनें
लिहून काढिलीं आणि अगदीं पहाटेस उठून पर्वताच्या
तळाशीं एक वेदी आणि इस्राएलाच्या बारा वंशांप्रमाणें
बारा स्तंभ उभारिले. ५ त्यानें इस्राएल लोकांपैकीं
कांहीं तरुणांना पाठविलें, त्यांनीं परमेश्वराला होमबलि
आणि बैलांचीं शांत्यर्पणें अर्पिलीं. ६ मोशानें अर्धे
रक्त घेऊन कटोऱ्यांत ठेविलें आणि अर्धे वेदीवर
शिंपडिलें. ७ मग त्यानें कराराचें पुस्तक घेऊन
लोकांस वाचून दाखविलें; तें ऐकून ते म्हणाले, जें
कांहीं परमेश्वरानें सांगितलें आहे तें सर्व आम्ही करूं
आणि त्याच्या आज्ञेत राहूं. ८ मोशानें रक्त घेऊन
लोकांवर शिंपडिलें आणि म्हटलें कीं पाहा, परमे-
श्वरानें या सर्व आज्ञांच्या शर्तीवर तुम्हांशीं जो
करार केला आहे त्याचें हें रक्त होय. ९ मग मोशे,
अहरोन, नादाब, अबीहू आणि इस्राएलांपैकीं सत्तर
वडील वर चढून गेले; १० त्यांनीं इस्राएलाच्या
देवाचें दर्शन घेतलें; त्याच्या चरणतळीं नीलमण्यांच्या
चबुतऱ्यासारखें कांहीं आहेसें दिसलें, आणि तें आकाशा-
प्रमाणें स्वच्छ होतें. ११ इस्राएल लोकांच्या सरदारां-
वर त्यानें हात उगारिला नाहीं; त्यांनीं परमेश्वराचें
दर्शन घेतलें आणि खाण्यापिण्याचा समारंभ केला.

१२ मग परमेश्वर मोशाला म्हणाला, पर्वतावर
चढून माझ्यापाशीं ये व तेथें राहा; मी तुला दगडी
पाट्या आणि लोकशिक्षणार्थ स्वलिखित नियम व आज्ञा
देतों. १३ मोशे व त्याचा सेवक यहोशवा हे देवाच्या
पर्वतावर चढून गेले. १४ मोशे वडिलांस म्हणाला,
आम्ही तुम्हांकडे परत येईपर्यंत तुम्ही येथें
आमची वाट पाहत राहा; पाहा, अहरोन व हूर हे
तुम्हांबरोबर आहेत; कोणाचें कांहीं प्रकरण असलें
तर तें त्यानें त्यांजकडे न्यावें. १५ मोशे पर्वतावर
चढून गेला आणि मेघानें पर्वत व्यापून टाकिला.
१६ परमेश्वराचें तेज सीनाय पर्वतावर राहिलें आणि
मेघानें सहा दिवस तो झांकून टाकिला आणि सातव्या
दिवशीं मेघांतून परमेश्वरानें मोशाला हाक मारिली.
१७ परमेश्वराचें तेज गिरिशिखरीं धगधगणाऱ्या
अग्नीप्रमाणें इस्राएल लोकांच्या दृष्टीस पडलें.
१८ या प्रकारें मोशे मेघांत प्रवेश करून पर्वतावर

चढला; मोशे पर्वतावर चाळीस दिवस व चाळीस
रात्री होता.

२५ १ परमेश्वर मोशाला म्हणाला: २ इस्राएल
लोकांस असें सांग कीं त्यांनीं मजप्रीत्यर्थ अर्पण
आणावें; जे कोणी मनापासून अर्पण करूं
इच्छितील त्या सर्वांचें अर्पण स्वीकारावें. ३ ज्या
वस्तूंचीं अर्पणें त्यांच्यापासून स्वीकारावयाचीं त्या ह्या:—
सोनें, चांदी, पितळ; ४ निळ्या, जांभळ्या आणि
किरमिजी रंगाचें सूत व तलम सणाचें कापड, बकऱ्यांचे
केस; ५ लाल रंगविलेलीं मेंढ्यांचीं कातडीं, तहशांचीं[1]
कातडीं; बाभळीचें लाकूड; ६ दिव्याचें तेल, अभि-
षेकाच्या तेलासाठीं आणि सुगंधी धुपासाठीं मसाले;
७ एफोदें व उरपट यांत खचण्यासाठीं गोमेद मणी
आणि इतर रत्नें. ८ माझा त्यांच्यामध्यें निवास व्हावा
म्हणून त्यांनीं माझ्यासाठीं एक पवित्रस्थान करावें.
९ निवासमंडपाचा व त्यांतील सगळ्या साहित्याचा नमुना
तुला दाखवितों त्या सगळ्याप्रमाणें तुम्हीं तें करावें.

१० बाभळीच्या लाकडाचा एक कोश बनवावा;
त्याची लांबी अडीच हात, रुंदी दीड हात व उंची दीड
हात असावी. ११ तो आंतूनबाहेरून शुद्ध सोन्यानें
मढवावा आणि कोशावर सभोवतीं सोन्याचा कंगोरा[2]
करावा; १२ आणि त्याच्या चारी पायांस लावण्यासाठीं
सोन्याच्या चार कड्या ओतून एका बाजूस दोन व
दुसऱ्या बाजूस दोन अशा लावाव्या; १३ आणि
बाभळीच्या लाकडाचे दांडे करून तेहि सोन्यानें
मढवावे. १४ तो कोश उचलावयासाठीं हे दांडे
त्याच्या दोहों बाजूंच्या कड्यांत घालावे. १५ हे दांडे
कोशाच्या कड्यांत राहावे; त्यांतून ते काढूं नयेत.
१६ आणि जो आज्ञापट मी तुला देईन तोहि त्या
कोशांत ठेवावा. १७ आणि शुद्ध सोन्याचें एक दया-
सन[3] बनवावें; त्याची लांबी अडीच हात व रुंदी दीड
हात असावी; १८ आणि सोनें घडवून दोन करूब
कर; दयासनाच्या दोन्ही बाजूंस ते कर. १९ एक
करूब एका बाजूस व दुसरा करूब दुसऱ्या बाजूस
करावा; हे करूब दयासनाशीं अखंड ठेवून दोहों
बाजूंस करावे. २० त्या करूबांचे पंख असे पसरलेले
असावे कीं त्यांनीं तें दयासन झांकावें आणि त्यांचीं
मुखें समोरासमोर असून त्यांची दृष्टि दयासनाकडे
लागलेली असावी. २१ दयासन कोशावर लावावें
आणि जो आज्ञापट मी तुला देईन तो त्या कोशांत
ठेवावा. २२ तेथें तुला मी भेट देत जाईन; आणि
इस्राएल लोकांसाठीं ज्या कांहीं गोष्टींसंबंधानें मी तुला
आज्ञा देणार आहें त्या सर्वांविषयीं मी दयासनावरून
आणि त्या आज्ञापटाच्या कोशावर असलेल्या दोन्ही
करूबांमधून तुजशीं बोलत जाईन.

२३ तसेंच बाभळीच्या लाकडाचें एक मेज बनीव;
त्याची लांबी दोन हात, रुंदी एक हात व उंची
दीड हात असावी. २४ तें शुद्ध सोन्यानें मढवून
त्याच्या सभोवार सोन्याचा कंगोरा करावा, २५ आणि
त्याच्यासाठीं चार बोटें रुंदीची एक पाळ करून तिच्या-
सभोवार सोन्याचा कंगोरा करावा. २६ सोन्याच्या
चार कड्या करून त्याच्या चारी पायांवरल्या चार
कोपऱ्यांला लावाव्या. २७ त्या कड्या पाळीच्या लगत
असाव्या; मेज उचलण्यासाठीं त्यांत दांडे घालावे.
२८ हे मेज उचलावयाचे दांडे बाभळीच्या लाकडाचे
करून सोन्यानें मढवावे; २९ आणि त्यावरचीं तबकें,
धुपाटण्यीं, सुरया आणि पेयार्पणाचे प्याले हीं सर्व शुद्ध
सोन्याचीं करावीं; ३० आणि मेजावर माझ्यापुढें
समर्पित केलेली भाकर नित्य ठेवावी.

३१ आणि शुद्ध सोन्याचा एक दीपवृक्ष बनवावा,
हा दीपवृक्ष, त्याची बैठक, त्याचा दांडा, त्याच्या वाट्या,
त्याचीं बोंडें व त्याचीं फुलें हीं सर्व सोन्याच्या एकाच
अखंड तुकड्याचीं घडवावीं; ३२ या दीपवृक्षाच्या सहा
शाखा असाव्या; त्याच्या एका बाजूस तीन शाखा व
दुसऱ्या बाजूस तीन शाखा असाव्या; ३३ एका बाजूच्या
प्रत्येक शाखेला बदामाच्या फुलांसारख्या तीनतीन
वाट्या बोंडांफुलांसह असाव्या; आणि दुसऱ्या बाजूच्या

[1] एका जातीचें जनावर. [2] एक प्रकारची
कांठपट्टी. [3] मुळांत: कप्पोरेथ: प्रायश्चित्तानें पाप-
क्षालन करावयाचें स्थान.

त्याच्या जोडीच्या प्रत्येक शाखेलाहि बदामाच्या फुलांसारख्या तीनतीन वाट्या बोंडांफुलांसह असाव्या; दीपवृक्षांतून निघालेल्या सहा शाखांची रचना अशीच असावी; ३४ आणि दीपवृक्षाच्या दांडीला बदामाच्या फुलांसारख्या बोंडांफुलांसह चार वाट्या असाव्या; ३५ आणि दीपवृक्षांतून निघणाऱ्या सहा शाखांस दोन-दोन शाखांच्या खालीं एकएक बोंड असून तीं त्याशीं अखंड जोडावीं. ३६ त्याचीं बोंडें व त्याच्या शाखा हीं सर्व त्याशीं अखंड जोडावीं; तो सबंध दीपवृक्ष शुद्ध सोन्याचा एकच तुकडा ठोकून घडवावा. ३७ आणि त्याच्यासाठीं सात दिवे करून त्याच्यावर ठेवावे म्हणजे दीपवृक्षाच्या पुढल्या बाजूस त्यांचा प्रकाश पडेल. ३८ त्याचे चिमटे आणि गुल्दानें हीं सर्व शुद्ध सोन्याचीं करावीं. ३९ या सर्व उपकरणांसहित हा दीपवृक्ष एक किक्कार[1] शुद्ध सोन्याचा करावा; ४० आणि पर्वतावर तुला दाखविलेल्या नमुन्याप्रमाणें या सर्व वस्तु बनविण्याची तूं सावधगिरी ठेव.

२६ १ निवासमंडपासाठीं दहा पडदे करावे; ते कातलेल्या तलम सणाच्या कापडाचे आणि निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांच्या सुताचे तयार करावे व त्यांत मोठ्या चतुर कारागिराकडून करूब काढवावे. २ एकेका पडद्याची लांबी अठ्ठावीस हात आणि रुंदी चार हात असावी; ते सर्व पडदे एकाच मापाचे असावे. ३ त्यांतले पांच पडदे एकमेकांशीं जोडिलेले असावे व दुसरे पांच पडदे एकमेकांशीं जोडिलेले असावे. ४ जेथें एक पडदा जोडिला जाईल तेथें किनारीवर निळ्या सुताचीं बिरडीं कर; तसेंच दुसऱ्या पडद्यावरील किनारीवरहि तशींच बिरडीं कर. ५ एका पडद्याला पन्नास बिरडीं कर आणि दुसऱ्या पडद्याच्या किनारीला पन्नास बिरडीं कर. हीं बिरडीं समोरासमोर असावीं. ६ तसेंच सोन्याचे पन्नास आंकडे बनवावे आणि या आंकड्यांनीं पडदे अशा प्रकारें जोडावे कीं सर्व मिळून निवासमंडप अखंड दिसेल.

७ निवासमंडपावर तंबू असावा म्हणून बकऱ्याच्या केसांचे पडदे करावे; हे पडदे अकरा असावे. ८ एकेका पडद्याची लांबी तीस हात व रुंदी चार हात असावी; हे अकरा पडदे एकाच मापाचे असावे. ९ पांच पडदे वेगळे आणि सहा पडदे वेगळे जोडावे; सहावा पडदा तंबूच्या पुढल्या बाजूस दुमडावा. १० जोडून केलेल्या एका कनातीच्या बाहेरील शेवटच्या पडद्याच्या किनारीवर पन्नास बिरडीं करावीं; तशींच कनातीच्या दुसऱ्या पडद्याच्या किनारीवरहि पन्नास बिरडीं करावीं ११ आणि पितळेचे पन्नास आंकडे करावे, आणि ते बिरड्यांत घालून तंबू असा जोडावा कीं तो सर्व अखंड दिसेल. १२ तंबूच्या पडद्यांचा लोंबत राहिलेला भाग म्हणजे उरलेला अर्धा पडदा निवासमंडपाच्या मागल्या बाजूस लोंबता सोडावा; १३ आणि तंबूचे पडदे लांबीकडून हातभर या बाजूस व हातभर त्या बाजूस असे निवासमंडप झांकण्यासाठीं त्याच्या दोहों बाजूंस लोंबते ठेवावे. १४ तंबूसाठीं तांबडा रंग दिलेल्या मेंढ्यांच्या कातड्यांचें एक आच्छादन आणि त्यावर तहशाच्या कातड्यांचें एक आच्छादन करावें.

१५ मग निवासमंडपास उभ्या लावण्यासाठीं बाभळीच्या लाकडाच्या फळ्या कराव्या. १६ प्रत्येक फळीची लांबी दहा हात व रुंदी दीड हात असावी. १७ प्रत्येक फळी दुसरीशीं जोडावी म्हणून तिला दोनदोन कुसें असावीं; निवासमंडपाच्या सर्व फळ्या अशाच कराव्या. १८ निवासमंडपासाठीं ज्या फळ्या तूं करिशील त्यांपैकीं वीस फळ्या दक्षिण बाजूसाठीं असाव्या. १९ या वीस फळ्यांच्या खालीं लावण्यासाठीं चांदीच्या चाळीस खुरच्या बनवाव्या म्हणजे एकेका फळीच्या खालीं कुसांसाठीं दोनदोन खुरच्या; २० त्याप्रमाणें निवासमंडपाच्या दुसऱ्या म्हणजे उत्तर बाजूसाठीं वीस फळ्या कराव्या; २१ त्यांसाठीं चांदीच्या चाळीस खुरच्या बनवाव्या म्हणजे एकेका फळीच्या खालीं दोन दोन खुरच्या. २२ निवासमंडपाच्या मागल्या म्हणजे पश्चिम बाजूसाठीं सहा फळ्या कराव्या; २३ आणि मागल्या बाजूस निवासमंडपाच्या कोपऱ्यासाठीं दोन फळ्या कराव्या.

१ सुमारें शंभर रत्तल.

२४ ह्या फळ्या खालपासून दोनदोन असून त्या दोन्ही वरच्या भागीं एकेका कडीनें जुळवाव्या, व दोन्ही फळ्या अशाच असाव्या; दोन्ही कोपऱ्यांसाठीं अशा फळ्या असाव्या. २५ आठ फळ्या व त्यांना चांदीच्या सोळा खुरच्या असाव्या, अर्थात् एकेका फळीच्या खालीं दोनदोन खुरच्या असाव्या; २६ आणि बाभळीच्या लाकडाचे अडसर तयार करावे; निवासमंडपाच्या एका बाजूच्या फळ्यांसाठीं पांच, २७ आणि दुसऱ्या बाजूच्या फळ्यांसाठीं पांच आणि त्याच्या पश्चिमेस म्हणजे मागल्या बाजूसाठीं पांच अडसर बनवावे. २८ आणि फळ्यांच्या मध्यभागीं लावावयाचा मधला अडसर तंबूच्या एका शेवटापासून दुसऱ्या शेवटापर्यंत पोंचेल असा असावा. २९ त्या फळ्या सोन्यानें मढवाव्या आणि अडसर लावण्याच्या कड्या सोन्याच्या बनवाव्या, आणि अडसरहि सोन्यानें मढवावे. ३० मीं तुला पर्वतावर दाखविल्याप्रमाणें निवासमंडप उभारावा.

३१ तसेंच निळ्या, जांभळ्या आणि किरमिजी रंगांच्या व कातलेल्या तलम सणाच्या सुताचा एक अंतरपट बनवावा व त्यावर चतुर कारागिराकडून करूब काढवावे; ३२ हा पट सोन्यानें मढविलेल्या बाभळीच्या लाकडाच्या चार खांबांवर लटकवावा, त्याच्या आंकड्या सोन्याच्या असाव्या व ते खांब चांदीच्या चार खुरच्यांत उभे करावे. ३३ अंतरपट आंकड्यांखालीं लटकवून त्याच्याआड आंतल्या बाजूस आज्ञापटाचा कोश ठेवावा; हा अंतरपट पवित्रस्थान व परमपवित्रस्थान हीं तुम्हांकरितां अलग करील. ३४ मग परमपवित्रस्थानांत आज्ञापटाच्या कोशावर दयासन ठेवावें. ३५ आणि त्या अंतरपटाच्या बाहेर निवासमंडपाच्या उत्तर बाजूस मेज ठेवावें व दक्षिण बाजूस मेजासमोर दीपवृक्ष ठेवावा; ३६ आणि तंबूच्या द्वारासाठीं निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांच्या व कातलेल्या तलम सणाच्या सुताचा वेलबुट्टीदार पडदा बनवावा. ३७ या पडद्यासाठीं बाभळीच्या लाकडाचे पांच खांब करावे आणि ते सोन्यानें मढवावे; त्यांचे आंकडे सोन्याचे असावे आणि त्यांसाठीं पितळेच्या पांच खुरच्या ओताव्या.

२७ १ बाभळीच्या लाकडाची पांच हात लांब व पांच हात रुंद अशी एक वेदी कर; ती चौरस असून तिची उंची तीन हात असावी. २ तिच्या चारी कोपऱ्यांस चार शृंगें बनवावीं; हीं शृंगें तिच्या अंगचीच असावीं; ही वेदी पितळेनें मढवावी. ३ तिच्यांतील राख उचलून नेण्यासाठीं पात्रें, त्याप्रमाणेंच तिच्यासाठीं पावडी, कटोरे, कांटे आणि अग्निपात्रें बनवावीं; तिचीं सर्व पात्रें पितळेचीं असावीं. ४ तिच्यासाठीं पितळेच्या जाळीची एक चाळण बनवावी व तिला चारी कोपऱ्यांस पितळेच्या चार कड्या लावाव्या. ५ ही चाळण वेदीच्या सभोवार कंगोऱ्याच्या खालीं अशी लावावी कीं ती वेदीच्या अर्ध्या उंचीइतकी यावी. ६ वेदीसाठीं बाभळीच्या लाकडाचे दांडे कर व ते पितळेनें मढीव. ७ ते दांडे कड्यांत घालावे म्हणजे जेव्हांजेव्हां वेदी उचलली जाईल तेव्हांतेव्हां तिच्या दोहों बाजूंस ते असतील. ८ वेदी मध्यें पोकळ ठेवून व बाजूंस फळ्या लावून बनवावी; पर्वतावर तुला दाखविल्याप्रमाणें ती करावी.

९ निवासमंडपाला अंगण कर; त्याच्या दक्षिण बाजूला कातलेल्या तलम सणाचे विणलेले पडदे मिळून त्यांची लांबी एका बाजूला शंभर हात असावी; १० त्यांना वीस खांब करावे आणि त्या खांबांना पितळेच्या वीस खुरच्या कराव्या; खांबांचे आंकडे आणि त्यांचीं बंधनें चांदीचीं करावीं. ११ त्याप्रमाणेंच अंगणाच्या उत्तर बाजूसहि शंभर हात लांबीचे पडदे असावे; त्यांसहि वीस खांब असून त्यांस पितळेच्या वीस खुरच्या असाव्या आणि त्या खांबांचे आंकडे व बंधनें चांदीचीं असावीं. १२ अंगणाच्या रुंदीकडील भागीं म्हणजे पश्चिमेकडे पन्नास हात पडदे असावे; त्यांचे खांब दहा व खुरच्याहि दहा असाव्या; १३ पूर्वेच्या बाजूस अंगणाची रुंदी पन्नास हात असावी; १४ आणि अंगणाच्या द्वाराच्या एका बाजूस पंधरा हात पडदे असावे; त्यांचे खांब तीन व खुरच्या तीन असाव्या. १५ आणि द्वाराच्या दुसऱ्या बाजूस पंधरा हात पडदे असून त्यांसहि तीन खांब व तीन खुरच्या

असाव्या. १६ अंगणाच्या द्वारासाठीं एक पडदा
बनवावा; तो निळ्या, जांभळ्या आणि किरमिजी
रंगांच्या व कातलेल्या तलम सणाच्या सुताचा वेल-
बुट्टीदार असावा; तो वीस हात असून त्याला चार
खांब व चार खुरच्या असाव्या. १७ अंगणाच्या
सभोवतालचे सर्व खांब चांदीच्या बंधनांनीं जोडिलेले
असावे; त्यांचे आंकडे चांदीचे आणि खुरच्या पितळेच्या
असाव्या. १८ अंगणाची लांबी शंभर हात व रुंदी
सारखी पन्नास हात आणि त्याच्या कनातीची उंची
पांच हात असावी; त्याची कनात कातलेल्या तलम
सणाच्या सुताची असून त्याच्या खांबाच्या खुरच्या
पितळेच्या असाव्या. १९ निवासमंडपांतील सगळें
उपकरणसाहित्य, त्याच्या सर्व मेखा, आणि अंगणाच्या
सर्व मेखा पितळेच्या असाव्या.

२० तूं इस्राएल लोकांस अशी आज्ञा कर कीं दीप
नित्य जळत राहावा म्हणून त्यांनीं दीपवृक्षासाठीं
जैतुनाचें कुटून काढिलेलें निर्मल तेल घेऊन यावें.
२१ आज्ञापटासमोर असणाऱ्या अंतरपटाबाहेर दर्शन-
मंडपांत अहरोन व त्याचे पुत्र यांनीं तो दीपवृक्ष
सांजपासून सकाळपर्यंत परमेश्वरासमोर उजळण्याची
व्यवस्था ठेवावी; हा इस्राएल लोकांसाठीं पिढ्यानपिढ्या
निरंतरचा विधि होय.

## २८

१ तुझा भाऊ अहरोन यानें याजकाच्या
नात्यानें माझी सेवा करावी म्हणून त्यास व
त्याच्याबरोबर त्याचे पुत्र नादाब, अबीहू,
एलाजार व इथामार यांस इस्राएल लोकांतून आपल्या-
जवळ आण; २ आणि गौरव व शोभा व्हावयासाठीं
तूं आपला भाऊ अहरोन याच्याकरितां पवित्र वस्त्रें कर;
३ आणि जे बुद्धिमंत आहेत व ज्यांच्याठायीं मीं
बुद्धीची पूर्ण प्रेरणा केली आहे त्या सर्वांस तूं अह-
रोनाचीं वस्त्रें तयार करण्याची आज्ञा दे; तेणेंकरून
तो माझ्याप्रीत्यर्थ याजकाचें काम चालविण्यासाठीं पवित्र
होईल. ४ त्यांनीं तयार करावयाचीं वस्त्रें हीं : उरपट,
एफोद, झगा, बुट्टीदार अंगरखा, मंदील व कमरबंद;
हीं पवित्र वस्त्रें तुझा भाऊ अहरोन व त्याचे पुत्र यांस
करावीं, अशासाठीं कीं त्यानें याजकाच्या नात्यानें
माझी सेवा करावी. ५ त्यांनीं सोन्याचा जर आणि
निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांचें सूत व तलम
सणाचें कापड घ्यावें.

६ एफोद सोन्याच्या जराचें आणि निळ्या,
जांभळ्या व किरमिजी रंगांच्या सुताचें व तलम
सणाच्या कापडाचें चतुर कारागिराकडून तयार
करवावें; ७ त्याच्या दोन खांदपट्ट्या जोडिलेल्या
असाव्या, व त्याचीं दोन शेवटें जोडावीं; ८ एफोद
बांधण्यासाठीं त्याजवर कुशलतेनें विणिलेली पट्टी असते
तिची बनावट त्याच्यासारखीच असून ती अखंड
असावी; सोन्याच्या जराची व निळ्या, जांभळ्या व
किरमिजी रंगांच्या सुताची आणि तलम सणाच्या
कापडाची ती असावी. ९ मग दोन गोमेद रत्नें
घेऊन त्यांवर इस्राएलाच्या पुत्रांचीं नांवें कोरावीं;
१० त्यांच्या नांवांपैकीं सहा एका रत्नावर व बाकीचीं
सहा दुसऱ्या रत्नावर त्यांच्या जन्मांच्या क्रमानें
कोरवावीं. ११ रत्नांवर खोदकाम करणाऱ्याच्या
कसबानें मुद्रा खोदिली जाते त्याप्रमाणें त्या दोन्ही
रत्नांवर इस्राएलाच्या पुत्रांचीं नांवें खोदवावीं
आणि तीं सोन्याच्या जाळीदार कोंदणांत बसवावीं.
१२ तीं दोन्ही रत्नें एफोदाच्या दोन्ही खांदपट्ट्यांवर
लावावीं; तीं इस्राएलपुत्रांचीं स्मारकरत्नें होत, म्हणजे
अहरोन त्यांचीं नांवें परमेश्वरासमोर आपल्या दोन्ही
खांद्यांवर स्मरणार्थ वागवील.

१३ त्याप्रमाणेंच सोन्याचीं जाळीदार कोंदणें
करावीं; १४ पीळ घातलेल्या दोरीसारख्या दोन
सांखळ्या शुद्ध सोन्याच्या कराव्या आणि त्या पीळ
घातलेल्या सांखळ्या त्या कोंदणांत बसवाव्या.
१५ न्यायाचा उरपटहि मोठ्या चतुर कारागिरा-
कडून तयार करवावा; एफोदाप्रमाणें तो सोन्याच्या
जराचा व निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांच्या
सुताचा व कातलेल्या तलम सणाच्या कापडाचा करावा.
१६ तो चौरस व दुहेरी असावा आणि त्याची लांबी
व रुंदी एकएक वीत असावी. १७ त्यांत रत्नें खचावीं,

त्यांत रत्नांच्या चार रांगा असाव्या; पहिल्या रांगेंत लाल पुष्कराज व माणिक; १८ दुसऱ्या रांगेंत पाच, नीलमणि व हिरा; १९ तिसऱ्या रांगेंत तृणमणि, सूर्यकांत व पद्मराग; २० आणि चौथ्या रांगेंत लसणा, गोमेद व यास्फे; हीं सर्व रत्नें सोन्याच्या कोंदणांत खचावीं. २१ इस्राएलपुत्रांच्या नांवांच्या संख्येएवढीं हीं रत्नें असावीं; त्यांच्या संख्येप्रमाणें बारा नांवें असावीं; मुद्रा जशी खोदितात तसें बारा वंशांपकीं एकेकाचें नांव एकेका रत्नावर खोदावें २२ दोरीसारखा पीळ घातलेल्या शुद्ध सोन्याच्या सांखळ्या उरपटावर लावाव्या. २३ उरपटावर दोन सोन्याच्या कड्या कराव्या; त्या दोन्ही कड्या उरपटाच्या दोन्ही शेवटांस लावाव्या. २४ उरपटाच्या शेवटांस लाविलेल्या त्या दोन कड्यांत पीळ घातलेल्या सोन्याच्या सांखळ्या घालाव्या. २५ पीळ घातलेल्या दोन्ही सांखळ्यांचीं दुसरीं शेवटें दोन्ही कोंदणांत जडून त्या एफोदाच्या दोन्ही खांदपट्ट्यांवर पुढल्या भागीं लावाव्या. २६ सोन्याचे आणखी दोन कोयंडे करून उरपटाच्या दोन्ही शेवटांवर म्हणजे एफोदाच्या आंतल्या बाजूस असलेल्या कोरीवर लावावे. २७ याखेरीज सोन्याचे आणखी दोन कोयंडे करून एफोदाच्या दोन्ही खांदपट्ट्यांवर खालच्या बाजूस त्याच्यासमोर त्याच्या सांध्याजवळ विणिलेल्या बुट्टीदार पट्टीवर लावावे. २८ त्या उरपटाचे कोयंडे एफोदाच्या कोयंड्यांला निळ्या फितीनें बांधावे; याप्रमाणें तो एफोदाच्या बुट्टीदार पट्टीवर राहील, आणि त्यापासून अलग व्हावयाचा नाहीं. २९ अहरोन पवित्रस्थानीं प्रवेश करील तेव्हां न्यायाच्या उरपटावर, आपल्या हृदयावर, इस्राएलाचीं नांवें वागवील, त्यायोगें परमेश्वरासमोर त्यांचें स्मरण नित्य राहील. ३० तूं न्यायाच्या उरपटांत उरीम व थुम्मीम ठेव आणि अहरोन परमेश्वरासमोर येईल तेव्हां ते त्याच्या हृदयावर असावे; या प्रकारें अहरोनानें इस्राएल लोकांचा न्याय आपल्या हृदयावर परमेश्वरासमोर नित्य वागवावा.

३१ एफोदाबरोबर घ्यावयाचा झगा सबंध निळ्या रंगाचा करावा. ३२ त्याच्या मध्यभागीं डोकें घालण्यासाठीं एक भोक असावें आणि त्याच्या सभोवार चिलखताच्या भोकाला असतो तसा विणिलेला गोट असावा म्हणजे झगा फाटावयाचा नाहीं. ३३ त्याच्या खालच्या घेरांत सभोवार निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांच्या सुताचीं डाळिंबें काढावीं आणि त्यांच्या दरम्यान सभोवार सोन्याचीं घुंगरें लावावीं, ३४ म्हणजे एक सोन्याचें घुंगरूं व एक डाळिंब, पुनः एक सोन्याचें घुंगरूं व एक डाळिंब अशीं झग्याच्या खालच्या घेरांत सभोवार असावीं. ३५ सेवा करण्याच्या समयीं तो झगा अहरोनानें धारण करावा; जेव्हां जेव्हां तो पवित्रस्थानाच्या आंत परमेश्वरासमोर जाईल किंवा बाहेर निघेल तेव्हां तेव्हां त्या घुंगरांचा आवाज व्हावा, नाहीं तर तो मरेल.

३६ शुद्ध सोन्याची एक पट्टिका बनवावी आणि जशी मुद्रा कोरितात तशीं तीवर हीं अक्षरें कोरावीं: **परमेश्वराप्रीत्यर्थ पवित्र**; ३७ आणि ती निळ्या फितीला अडकवून मंदिलाच्या पुढल्या भागीं लाविलेली असावी. ३८ ती अहरोनाच्या कपाळाला असावी, यासाठीं कीं इस्राएल लोक जें कांहीं पवित्र करितील म्हणजे जितक्या पवित्र भेटी ते आणितील त्यासंबंधाचा दोष अहरोनानें वाहावा; ती नित्य त्याच्या कपाळाला असावी; अशानें परमेश्वर लोकांवर प्रसन्न राहील. ३९ अंगरखा तलम सणाचा नक्षीदार विणावा; तसेंच एक मंदीलहि तलम सणाचा करावा आणि कशिदा काढिलेला एक कमरबंद करावा.

४० अहरोनाच्या पुत्रांसाठींहि अंगरखे, कमरबंद व फेटे करावे; हीं वस्त्रें गौरव व शोभा यांसाठीं करावीं. ४१ तुझा भाऊ अहरोन यास व त्याच्याबरोबर त्याच्या पुत्रांस हीं वस्त्रें लेववून अभिषेक व संस्कार करावा, आणि त्यांस पवित्र करावें म्हणजे ते माझी सेवा याजकाच्या नात्यानें करितील. ४२ त्यांच्यासाठीं सणाचे चोळणे करावे, त्यांनीं त्यांचें अंग झांकलेलें राहील; ते कमरेपासून मांडीपर्यंत असावे; ४३ आणि अहरोन अथवा त्याचे पुत्र दर्शनमंडपांत प्रवेश करितील व

पवित्रस्थानांत सेवा करण्यासाठीं वेदीपाशीं जातील
तेव्हां त्यांनीं हे चोळणे घातलेले असावे, नाहींतर
त्यांना दोष लागून ते मरतील; अहरोनाला व त्याच्या
पश्चात् त्याच्या वंशाला हा नियम निरंतरचा होय.

२९ १ त्यांनीं याजकाच्या नात्यानें माझी सेवा
करावी म्हणून त्यांस पवित्र करण्यासाठीं जें
तुला करावयाचें तें हें: एक गोऱ्हा आणि
दोन निर्दोष मेंढे घ्यावे, २ आणि बेखमीर भाकरी,
तेलांत मळलेल्या बेखमीर पोळ्या आणि तेल
लावलेल्या बेखमीर चपात्या घ्याव्या; ह्या सर्व गव्हाच्या
सपिठाच्या असाव्या. ३ ह्या सर्व एका टोपलींत घाल
आणि तो गोऱ्हा व ते दोन मेंढे यांसहित ती टोपली
घेऊन ये. ४ मग अहरोन व त्याचे पुत्र यांस दर्शन-
मंडपाच्या द्वारासमोर आणून स्नान घाल; ५ आणि तीं
वस्त्रें घेऊन अहरोनाला त्याचा अंगरखा व एफोदाचा
झगा घाल, त्यास एफोद व उरपट बांध आणि एफोदाचा
बुट्टीदार पट्टा त्याच्या कमरेस बांध; ६ त्याच्या डोकीला
मंदील घाल आणि मंदिलास पवित्र मुकुट लाव. ७ नंतर
अभिषेकाचें तेल त्याच्या डोईवर ओतून त्याला अभिषेक
कर. ८ मग त्याच्या पुत्रांस समीप आणून त्यांच्या
अंगांत अंगरखे घाल; ९ आणि अहरोनास व त्याच्या
पुत्रांस कमरबंद बांध, त्यांच्या डोकीस फेटे बांध; या
प्रकारें ह्या निरंतरच्या विधीनें त्यांस याजकपद प्राप्त व्हावें
आणि अहरोन व त्याचे पुत्र यांचा संस्कार करावा.

१० तो गोऱ्हा दर्शनमंडपासमोर आणावा आणि अहरोन
व त्याचे पुत्र यांनीं आपले हात त्याच्या शिरावर ठेवावे.
११ मग परमेश्वरासमोर दर्शनमंडपाच्या द्वारीं तो
गोऱ्हा वधावा. १२ गोऱ्ह्याचें कांहीं रक्त घेऊन तूं
आपल्या अंगुलीनें तें वेदीच्या शृंगांस लावावें व बाकीचें
सगळें रक्त वेदीच्या पायथ्याशीं ओतावें. १३ त्याच्या
आंतड्यांवर असलेली सगळी वपा, काळजावरील
पडदा, दोन्ही गुर्दे व त्यांवरील वपा हीं सर्व घेऊन
त्यांचा वेदीवर होम करावा; १४ पण गोऱ्ह्याचें मांस,
त्याचें कातडें व विष्ठा हीं छावणीबाहेर नेऊन आगींत
जाळावीं; कारण हा पापार्पणाचा बलि होय.

१५ एक मेंढा घेऊन त्याच्या शिरावर अहरोन व त्याचे
पुत्र यांनीं आपले हात ठेवावे; १६ आणि तो मेंढा वधून
त्याचें रक्त वेदीवर सभोवार शिंपडावें; १७ मग तो मेंढा
कापून त्याचे तुकडे करावे आणि त्याचीं आंतडीं व
पाय धुऊन तीं त्याचे तुकडे व डोकें यांबरोबर ठेवावीं.
१८ मग त्या सर्व मेंढ्याचा वेदीवर होम करावा; तो परमे-
श्वराप्रीत्यर्थ होमबलि होय. तो परमेश्वराप्रीत्यर्थ मधुर
सुगंध हव्य होय.

१९ नंतर दुसरा मेंढा घेऊन त्याच्या शिरावर अहरोन
व त्याचे पुत्र यांनीं आपले हात ठेवावे; २० मग तो मेंढा
वधावा आणि त्याचें कांहीं रक्त घेऊन अहरोन व त्याचे पुत्र
यांच्या उजव्या कानाच्या शेंड्याला आणि त्यांच्या उजव्या
हाताच्या व उजव्या पायाच्या अंगठ्यांला लावावें आणि
बाकीचें वेदीवर सभोवार शिंपडावें. २१ वेदीवरील रक्त
आणि अभिषेकाचें तेल यांतलें कांहीं घेऊन अहरोनावर व
त्याच्या वस्त्रांवर, तसेंच त्याच्याबरोबर त्याच्या पुत्रांवर
व त्यांच्या वस्त्रांवरहि शिंपडावें; अशानें तो व त्याचीं
वस्त्रें आणि त्याच्याबरोबर त्याचे पुत्र व त्यांचीं वस्त्रें
पवित्र होतील. २२ तो मेंढा संस्काराचा आहे म्हणून
त्याची वपा, त्याचें चरबीदार शेपूट, त्याच्या आंतड्यां-
वरील वपा व काळजावरील पडदा, दोन्ही गुर्दे व
त्यांवर असलेली वपा आणि उजवा फरा हीं घे;
२३ त्याप्रमाणेंच परमेश्वरासमोर ठेविलेल्या बेखमीर
भाकरींच्या टोपलींतून एक भाकर, तेलांत मळलेल्या
सपिठाची एक पोळी आणि एक चपाती घे; २४ आणि
हें सर्व अहरोन व त्याचे पुत्र यांच्या हातांवर ठेव
आणि हें ओवाळणीचें अर्पण म्हणून परमेश्वरासमोर
ओवाळ. २५ मग त्या वस्तु त्यांच्या हातून घेऊन
वेदीवरील होमबलीवर होम करावा; हा परमेश्वरासमोर
मधुर सुगंध होय; हें परमेश्वराला अर्पिलेलें हव्य होय.

२६ मग अहरोनाच्या संस्कारार्थ वधिलेल्या मेंढ्याचें
ऊर घेऊन ओवाळणी म्हणून परमेश्वरासमोर ओवाळ;
तो तुझा हिस्सा होय; २७ आणि अहरोन व त्याचे
पुत्र यांच्या संस्कारासाठीं वधिलेल्या मेंढ्याचें ओवा-
ळलेलें ऊर आणि समर्पिलेला फरा हीं तूं पवित्र

करावी; २८ इस्राएल लोकांकडून मिळणारा अहरोनाचा व त्याच्या पुत्रांचा हा निरंतरचा हक्क होय, कारण हा समर्पित केलेला अंश होय; हा त्यांच्याकडून इस्राएलांच्या शांत्यर्पणाच्या यज्ञांपैकीं परमेश्वराप्रीत्यर्थ समर्पित केलेला अंश होय.

२९ अहरोनाचीं पवित्र वस्त्रें त्याच्या पश्चात् त्याच्या पुत्रांसाठीं असावीं, ह्या वस्त्रांनिशीं त्यांचा अभिषेक व संस्कार व्हावा. ३० त्या पुत्रांपैकीं जो त्याच्या जागीं याजक होईल त्यानें पवित्रस्थानांतली सेवा करण्यासाठीं दर्शनमंडपांत दाखल होतांना हीं वस्त्रें सात दिवस परिधान केलीं पाहिजेत.

३१ संस्कारासाठीं वधिलेला मेंढा घेऊन त्याचें मांस एकाद्या पवित्र जागीं शिजीव. ३२ मग अहरोन व त्याचे पुत्र यांनीं त्या मेंढ्याचें मांस आणि टोपलींतील भाकर दर्शनमंडपाच्या द्वारीं भक्षण करावी; ३३ त्यांचा संस्कार व पवित्रीकरण यांसाठीं ज्या पदार्थांनीं प्रायश्चित्तविधि करण्यांत येईल ते पदार्थ त्यांनीं खावे; पण अन्य कुळांतल्या कोणीं ते खाऊं नयेत, कारण ते पदार्थ पवित्र होत. ३४ समर्पण केलेलें कांहीं मांस किंवा भाकर सकाळपर्यंत राहिली तर तो शेष अग्नींत जाळून टाकावा; तो खाऊं नये, कारण तो पवित्र आहे.

३५ मीं तुला आज्ञापिलेल्या सर्व गोष्टींप्रमाणें अहरोन व त्याचे पुत्र यांचें कर, आणि सात दिवसपर्यंत त्यांचा संस्कार कर. ३६ प्रायश्चित्तासाठीं पापबलि म्हणून एक गोऱ्हा प्रतिदिनीं बलि दे आणि वेदीसाठीं प्रायश्चित्त करून ती शुद्ध करावी आणि ती पवित्र करण्यासाठीं तिला अभिषेक करावा. ३७ सात दिवस वेदीसाठीं प्रायश्चित्त करून ती पवित्र कर म्हणजे वेदी परम पवित्र होईल; ज्याचा वेदीला स्पर्श होईल तें पवित्र होईल.

३८ वेदीवर नित्य होम करावयाचा तो असा: प्रतिदिनीं एकएक वर्षाच्या दोन कोकरांचा होम करावा. ३९ एका कोकराचा होम सकाळीं आणि दुसऱ्या कोकराचा होम सायंकाळीं करावा; ४० कुटून काढिलेल्या पाव हिन तेलांत, एक दशमांश माप सपीठ मिळून तें एका कोकराबरोबर अर्पावें, आणि पाव हिनभर द्राक्षारसाचें पेयार्पण करावें. ४१ दुसरें कोकरूं सायंकाळीं अर्पावें व त्याबरोबरहि सकाळच्याप्रमाणें अन्नार्पण व पेयार्पण करावें; हें परमेश्वराप्रीत्यर्थ मधुर सुगंध हव्य होय. ४२ तुमच्या पिढ्यानपिढ्या दर्शनमंडपाच्या द्वाराशीं परमेश्वरासमोर असाच होमबलि नित्य अर्पावा: ह्या स्थलीं तुझ्याशीं बोलण्यासाठीं मी तुम्हांस भेटेन. ४३ या स्थलीं मी इस्राएल लोकांस भेट देईन आणि माझ्या तेजानें तें पवित्र होईल. ४४ दर्शनमंडप व वेदी मी पवित्र करीन; अहरोन व त्याचे पुत्र यांनीं याजकाच्या नात्यानें माझी सेवा करावी म्हणून त्यांसहि मी पवित्र करीन. ४५ आणि मी इस्राएल लोकांमध्यें माझा निवास करीन आणि त्यांचा देव होईन. ४६ त्यांच्यामध्यें वस्ती करण्यासाठीं ज्यानें त्यांस मिसर देशांतून बाहेर काढिलें तो मी परमेश्वर त्यांचा देव आहें असें त्यांस कळेल; मी त्यांचा देव परमेश्वर आहें.

**३०** १ धूप जाळण्यासाठीं एक वेदी कर; ती बाभळीच्या लाकडाची असावी. २ तिची लांबी एक हात व रुंदी एक हात अशी ती चौरस असावी; आणि तिची उंची दोन हात असून तिचीं शृंगें अंगचींच असावीं. ३ त्या वेदीचा वरला भाग व तिच्या चारी बाजू आणि तिचीं शृंगें अशी ती सगळी शुद्ध सोन्यानें मढवावी; व तिला सभोवार सोन्याचा कंगोरा करावा. ४ सोन्याच्या कड्या करून त्या तिच्या कंगोऱ्याखालीं तिच्या दोन्ही अंगच्या दोन कोनांस दोन दोन लावाव्या; ह्या कड्यांत वेदी उचलून नेण्याचे दांडे घालतां येतील. ५ दांडे बाभळीच्या लाकडाचे करून सोन्यानें मढवावे. ६ आज्ञापटाच्या कोशाजवळ असलेल्या पडद्यासमोर, अर्थात् आज्ञापटावरील ज्या दयासनीं मी तुला दर्शन देत जाईन त्यासमोर ही वेदी ठेवावी. ७ ह्या वेदीवर अहरोनानें सुगंधी द्रव्ययुक्त धूप जाळावा; रोज सकाळीं तो तेलवात करील तेव्हां हा धूप त्यानें जाळावा; ८ तसाच संध्याकाळीं तो दिवे लावील तेव्हां त्यानें नित्य धूप जाळावा; हा धूप

तुम्ही पिढ्यानपिढ्या निरंतर परमेश्वरासमोर जाळीत
जा. ९. तिजवर अशास्त्रोक्त धूप, होमबलि, अन्नबलि,
अथवा कोणत्याहि प्रकारचें पेयार्पण अर्पावयाचें नाहीं.
१० अहरोनानें वर्षांतून एकदां तिच्या शृंगांवर
प्रायश्चित्त करावें; पिढ्यानपिढ्या वर्षांतून एकदां प्राय-
श्चित्तासाठीं अर्पिलेल्या पापबलीच्या रक्तानें तिजसाठीं
त्यानें प्रायश्चित्त करावें; ही वेदी परमेश्वराप्रीत्यर्थ परम-
पवित्र होय.

११ मग परमेश्वर मोशाला म्हणाला, १२ तूं इस्रा-
एल लोकांच्या संख्येप्रमाणें त्यांची मोजदाद करिशील
तेव्हां गणनासमयीं त्यांच्यावर कांहीं मरी येऊं नये म्हणून
त्यांतल्या प्रत्येकानें आपल्या जिवाबद्दल परमेश्वराला
त्या वेळीं खंड द्यावा. १३ जितक्या लोकांची मोजदाद
होईल तितक्यांनीं पवित्रस्थानांतील शेकेलाच्या वजना-
प्रमाणें अर्धा शेकेल द्यावा (शेकेल म्हणजे वीस
गेरे), हा अर्धा शेकेल परमेश्वराप्रीत्यर्थ समर्पित
केलेला अंश होय. १४ वीस वर्षांच्या व त्याहून अधिक
वयाच्या लोकांमध्यें ज्यांची गणना होईल त्यांतील
प्रत्येकानें परमेश्वराप्रीत्यर्थ हा अंश समर्पावा.
१५ तुम्हां आपल्या जिवाबद्दल प्रायश्चित्त म्हणून
परमेश्वराप्रीत्यर्थ हा अंश समर्पित कराल तेव्हां श्रीमंत
लोकांनीं अर्ध्या शेकेलाच्यावर देऊं नये किंवा गरीब
लोकांनीं त्याहून कमी देऊं नये. १६ इस्राएल लोकां-
पासून प्रायश्चित्ताचा पैका घेऊन दर्शनमंडपाच्या कामास
लावावा; हा पैका इस्राएल लोकांच्या जिवांबद्दल प्राय-
श्चित्त दिल्याचें स्मारक म्हणून त्यांच्याप्रीत्यर्थ परमेश्वरा-
समोर राहील.

१७ मग परमेश्वरानें मोशाला सांगितलें, १८ तूं
धुण्यासाठीं पितळेचें एक गंगाळ बनवावें; त्याला पितळेची
बैठक करावी; तें दर्शनमंडप आणि वेदी यांच्या
दरम्यान ठेवून त्यांत पाणी भरावें. १९ अहरोन
आणि त्याचे पुत्र यांनीं आपले हातपाय त्यांत धुवावे;
२० दर्शनमंडपांत प्रवेश करण्यापूर्वी आणि वेदीपाशीं
सेवा करण्यास म्हणजे परमेश्वराप्रीत्यर्थ हव्य जाळाव-
यास जातेवेळीं त्यांनीं आपले हातपाय पाण्यानें धुवावे,
नाहीं तर ते मरतील; २१ या प्रकारें त्यांनीं हात-
पाय धुवावे, नाहीं तर ते मरतील; अहरोन आणि
त्याचे वंशज यांच्यासाठीं पिढ्यानपिढ्या हा निरंतरचा
विधि व्हावा.

२२ मग परमेश्वरानें मोशाला सांगितलें कीं
२३ तू मुख्यमुख्य मसाले घे, म्हणजे पवित्रस्थानां-
तल्या वजनाप्रमाणें पांचशें शेकेल निर्भेळ गंधरस,
त्याच्या निम्मे म्हणजे अडीचशें शेकेल सुगंधी दाल-
चिनी, अडीचशें शेकेल सुगंधी वच, २४ पांचशें
शेकेल तज, आणि एक हिनभर जैतुनाचें तेल हीं
घेऊन, २५ त्यांचें अभिषेकाचें पवित्र तेल म्हणजे गंध्याच्या
रीतीप्रमाणें मिश्र केलेलें सुगंधी तेल तयार कर; हें अभि-
षेकाचें पवित्र तेल होय. २६ या तेलानें दर्शनमंडप
व आज्ञापटाचा कोश, २७ मेज व त्यावरील सर्व
सामान, दीपवृक्ष, व त्याचीं उपकरणें, धूपवेदी,
२८ होमवेदी व तिचें सर्व सामान व बैठकी-
सह गंगाळ यांस अभिषेक करावा. २९ त्यांस
पवित्र करावें म्हणजे तीं परमपवित्र ठरतील;
ज्याला स्पर्श त्यांना होईल तें पवित्र होईल.
३० आणि याजकाच्या नात्यानें माझी सेवा करण्या-
साठीं अहरोन व त्याचे पुत्र यांस अभिषेक करून
पवित्र कर. ३१ इस्राएल लोकांस माझी ही अनुज्ञा
सांग कीं पिढ्यानपिढ्या तुम्हांस मजप्रीत्यर्थ पवित्र
अभिषेकाचें तेल हेंच असणार. ३२ हें तेल कोणाहि
मनुष्याच्या अंगाला लावावयाचें नाहीं व या प्रकारचें
मिश्रण कोणीं करावयाचें नाहीं; हें पवित्र आहे; आणि
तुम्हीं त्याला पवित्रच लेखावें. ३३ जो कोणी त्यासारखें
मिश्रण तयार करील किंवा कोणा परक्यास तें लावील
त्याचा स्वजनांतून उच्छेद व्हावा.

३४ मग परमेश्वर मोशाला म्हणाला, तूं सुगंधी
मसाले म्हणजे उत्तम गंधरस, जटामांसी, गंधाबिरुजा,
व निर्भेळ ऊद हीं घ्यावीं; हीं सर्व समभाग घ्यावीं; ३५
आणि गंध्याच्या रीतीप्रमाणें लोण मिसळून निर्भेळ,
शुद्ध आणि पवित्र असें धूपद्रव्य तयार करावें;
३६ त्यांतलें कांहीं कुटून त्याची बुकणी करावी आणि

ती थोडीशी घेऊन दर्शनमंडपांतील ज्या कोशापुढें मी
तुला दर्शन देत जाईन त्यांत ठेवावी; ती तुम्हीं परम-
पवित्र लेखावी. ३७ जें धूपद्रव्य तूं तयार करिशील
त्यासारखें मिश्रण तुम्हीं कोणीं आपल्या स्वतांसाठीं
तयार करूं नये; हें परमेश्वराप्रीत्यर्थ पवित्र लेखावें.
३८ कोणी वास घेण्याकरितां असलें कांहीं तयार
करील तर त्याचा स्वजनांतून उच्छेद व्हावा.

३१ १ मग परमेश्वरानें मोशाला म्हटलें,
२ पाहा, मीं यहूदावंशांतील उरीचा पुत्र व
हूरचा नातू बसालेल याला नांव घेऊन बोला-
विलें आहे; ३ देवाच्या आत्म्यानें मीं त्यास परिपूर्ण
करून अक्कल, बुद्धि, ज्ञान आणि सर्व तऱ्हेचें
कसब हीं दिलीं आहेत; ४ तो कलाकुसरीचीं कामें
करील, सोनें, रुपें व पितळ यांचीं कामें करील,
५ जडावासाठीं रत्नांस पैलू पाडील, लाकडाचें
नकशीकाम करील आणि अशा सर्व प्रकारचीं कारागि-
रीचीं कामें करील; ६ आणि पाहा, त्याच्या जोडीस
मीं दानवंशांतील अहिसामाखाचा पुत्र अहलियाव यास
नेमिलें आहे; एवढेंच नव्हे तर जितके म्हणून बुद्धि-
मान् आहेत त्या सर्वांच्या हृदयांत मीं बुद्धि ठेविली
आहे, ती यासाठीं कीं ज्या ज्या गोष्टींसंबंधानें मीं तुला
आज्ञा केली आहे त्या त्या सर्व त्यांनीं कराव्या; ७ म्हणजे
दर्शनमंडप, आज्ञापट आणि त्यावरील दयासन आणि
तंबूचें सर्व सामान, ८ मेज व त्यावरील सर्व सामान,
शुद्ध दीपवृक्ष व त्याचीं सर्व उपकरणें, धूपवेदी,
९ होमवेदी व तिचें सर्व सामान आणि गंगाळ व
त्याची बैठक, १० सेवेसाठीं विणिलेलीं तलम वस्त्रें आणि
याजकाचें काम चालविण्यासाठीं अहरोन याजकाचीं
पवित्र वस्त्रें, त्याच्या पुत्रांचीं वस्त्रें, ११ अभिषेकाचें
तेल व पवित्रस्थानासाठीं सुगंधी द्रव्यांचा धूप या
सर्वांच्या संबंधानें मीं तुला आज्ञा दिली आहे त्याप्रमाणें
तें करितील.

१२ मग परमेश्वर मोशाला म्हणाला, १३ तूं
इस्राएल लोकांस आणखी असें सांग कीं, तुम्हीं माझे
शब्बाथ अवश्य पाळावे, कारण तुमच्या पिढ्यानपिढ्या
माझ्यातुमच्यामध्यें ही एक खूण ठरली आहे;
यावरून हें कळावें कीं तुम्हांस पवित्र करणारा मी परमे-
श्वर आहें, १४ म्हणून तुम्हीं शब्बाथ पाळावा; तो
तुम्हांकरितां पवित्र आहे; जो कोणी तो भ्रष्ट करील
त्याला अवश्य मारून टाकावें; जो कोणी त्या दिवशीं
कांहीं काम करील त्याचा स्वजनांतून अवश्य उच्छेद
व्हावा. १५ सहा दिवस काम करावें, पण सातवा
दिवस, तुम्हांला परमेश्वराप्रीत्यर्थ पवित्र दिवस, परम
विश्रामाचा शब्बाथ होय; कोणी शब्बाथ दिवशीं कांहीं
काम करील तर त्याला अवश्य ठार मारावें.
१६ इस्राएल लोकांनीं शब्बाथ पाळावा; हा निरंतरचा
करार समजून तो पिढ्यानपिढ्या पाळावा. १७ माझ्या-
मध्यें व इस्राएल लोकांमध्यें ही निरंतरची खूण होय;
कारण परमेश्वरानें सहा दिवसांत आकाश व पृथ्वी
उत्पन्न करून सातव्या दिवशीं विश्रांति घेतली आणि
श्रमपरिहार केला.

१८ परमेश्वरानें मोशाबरोबर सीनाय पर्वतावर हें सर्व
भाषण केल्यानंतर आपल्या बोटानें लिहिलेले पाषाणाचे
दोन आज्ञापट त्याला दिले.

३२ १ मोशाला पर्वतावरून उतरण्यास विलंब
लागला असें लोकांनीं पाहिलें तेव्हां ते अहरोना-
सभोवतीं जमून त्यास म्हणाले, ऊठ,
आमच्या पुढें चालतील असे देव आम्हासाठीं
बनीव; कारण आम्हांस मिसर देशांतून बाहेर आण-
णारा मनुष्य मोशे यांचें काय झालें हें आम्हांस
कळत नाहीं. २ तेव्हां अहरोनानें त्यांस सांगितलें कीं
तुमच्या स्त्रिया, पुत्र व कन्या यांच्या कानांत सोन्याचीं
कुंडलें आहेत तीं काढून मजकडे घेऊन या. ३ मग
सर्व लोकांनीं आपल्या कानांतील सोन्याचीं कुंडलें
काढून अहरोनाकडे आणिलीं. ४ त्याने ती त्यांच्या
हातून घेऊन त्यांचें एक वासरूं ओतून त्यास कोरणीनें
कोरिलें; तेव्हां ते म्हणूं लागले कीं, हे इस्राएला, ज्या
देवांनीं तुला मिसर देशांतून सोडवून आणिलें आहे तेच
हे तुझे देव. ५ हें पाहून अहरोनानें त्याच्यापुढें एक वेदी
बांधिली आणि जाहीर केलें कीं उद्यां परमेश्वराप्रीत्यर्थ

उत्सव करावयाचा आहे. ६ म्हणून दुसरे दिवशीं लोकांनीं
पहाटेस उठून होमबलि अर्पिले आणि शांत्यर्पणें आणिलीं;
मग ते खायलाप्यायला बसले आणि उठून खेळूं लागले.
७ तेव्हां परमेश्वर मोशाला म्हणाला, चल, खालीं
उतर, कारण ज्या तुझ्या लोकांस तूं मिसर देशांतून
आणिलें ते बिघडले आहेत; ८ ज्या मार्गानें त्यांनीं
जावें म्हणून मीं त्यांस आज्ञापिलें होतें तो मार्ग लव-
करच सोडून ते बहकून गेले आहेत; त्यांनीं एक
ओतींव वासरूं करून त्याची पूजाअर्चा केली व त्यास
बलि अर्पण केले आणि, हे इस्राएला, ज्यांनीं तुला
मिसर देशांतून सोडवून आणिलें आहे तेच हे
तुझे देव असें ते म्हणूं लागले आहेत. ९ मग परमे-
श्वरानें मोशाला म्हटलें, मी या लोकांस पाहून चुकलों
आहें, हे केवळ ताठ मानेचे लोक आहेत: १० तर
आतां मला आड येऊं नको: मी आपला कोप त्यांज-
वर भडकवून त्यांस भस्म करितों आणि तुझेंच एक
मोठें राष्ट्र करितों. ११ तेव्हां मोशे आपला देव पर-
मेश्वर याची काकळूत करून म्हणाला, हे परमेश्वरा,
तूं आपल्या लोकांस महत्सामर्थ्यानें व भुजबलानें
मिसर देशांतून सोडवून बाहेर आणिलें त्यांजवर तुझा
कोप कां भडकावा ? १२ त्यांस पहाडांमध्यें मारून
टाकावें आणि धरित्रीवरून त्यांस नष्ट करावें म्हणून
त्यांस मिसर देशांतून परमेश्वरानें बाहेर काढिलें असें मिसरी
लोकांनीं कां बोलावें ? आपल्या तीव्र कोपापासून निवृत्त
हो, आणि आपल्या लोकांवर अरिष्टें आणण्याचें तूं योजिलें
आहे त्यापासून परावृत्त हो. १३ तुझे दास अब्रा-
हाम, इसहाक व इस्राएल यांची आठवण कर: तूं त्यांस
स्वतांची शपथ वाहून सांगितलें होतें कीं मी तुमची
स्वत:ची आकाशांतील ताऱ्यांसारखी बहुगुणित करीन,
आणि ज्या ह्या देशाविषयीं मीं तुम्हांस सांगितलें तो
अवघा तुमच्या संततीस देईन आणि ती त्याची निरं-
तरची वतनदार होईल. १४ तेव्हां मी आपल्या
लोकांचें अनिष्ट करीन असें जें परमेश्वर म्हणाला होता
त्यापासून तो परावृत्त झाला.
१५ मग मोशे मागें फिरून आपल्या हातीं आज्ञा-
पटाच्या त्या दोन पाट्या घेऊन डोंगरावरून खालीं
उतरला; त्या पाट्यांवर पुढल्या व मागल्या अशा
दोहों बाजूंस लिहिलें होतें. १६ ह्या पाट्या देवकृत
होत्या आणि त्यांवर खोदलेला लेख देवानें लिहिलेला
होता. १७ यहोशवानें लोकांचा गलबला ऐकला तेव्हां
तो मोशास म्हणाला, छावणींत रणशब्द ऐकूं येत आहे.
१८ तो म्हणाला, हा शब्द होत आहे तो विजय
पावलेल्यांचा नव्हे अथवा पराभव पावलेल्यांचाहि
नव्हे, तर माझ्या कानीं पडत आहे तो गाणाऱ्यांचा
ध्वनि आहे. १९ मोशे छावणीजवळ येऊन पोहं-
चल्यावर तें वासरूं व नाचणारे लोक त्याच्या
दृष्टीस पडले, तेव्हां त्याचा राग भडकला आणि त्यानें
आपल्या हातांतल्या पाट्या पर्वताच्या तळाशीं फेकून
फोडून टाकिल्या. २० तसेंच त्यांनीं बनविलेलें तें वासरूं
घेऊन त्यानें अग्नींत टाकिलें व त्याचा कुटून चुरा
केला; तो त्यानें पाण्यावर टाकिला व तें पाणी त्यानें
इस्राएल लोकांस प्यावयास लाविलें.
२१ तेव्हां मोशे अहरोनास म्हणाला, तूं या लोकांस
एवढ्या पातकांत घातलें असें यांनीं तुझें काय केलें होतें ?
२२ अहरोन म्हणाला, माझ्या स्वामीचा कोप मजवर न
व्हावा; या लोकांची प्रवृत्ति पापाकडे आहे, हें आपणाला
ठाऊकच आहे. २३ त्यांनीं मला सांगितलें कीं आमच्या
पुढें चालतील असे देव आम्हांसाठीं बनीव; कारण
आम्हांस मिसर देशांतून बाहेर आणणारा मनुष्य
मोशे याचें काय झालें तें आम्हांस कळत नाहीं.
२४ मीं त्यांस सांगितलें, ज्या कोणाजवळ सोनें असेल
त्यानें तें काढून मला द्यावें; त्याप्रमाणें त्यांनीं तें मला
दिलें; तें मीं अग्नींत टाकिलें तों त्यांतून हें वासरूं
बाहेर आलें.
२५ मोशानें पाहिलें कीं हे लोक बेलगामी झाले
आहेत; अहरोनानें त्यांस बेलगामी होऊं दिलें यामुळें
ते शत्रूंच्या उपहासास पात्र झाले. २६ तेव्हां तो
छावणीच्या प्रवेशस्थानाशीं उभा राहून म्हणाला, परमे-
श्वराच्या पक्षाचा जो कोणी असेल त्यानें मजकडे
यावें. तेव्हां लेवी वंशांतले सर्व लोक त्याच्या-

जवळ जमा झाले. २७ तो त्यांस म्हणाला, इस्राएलाचा देव परमेश्वर म्हणतो कीं तुम्ही प्रत्येक आपल्या कमरेस तरवार लटकावा आणि छावणीच्या या प्रवेशद्वारापासून त्या प्रवेशद्वारापर्यंत सर्वत्र फिरून आपले बंधु, सोबती, शेजारी, या सर्व माणसांचा वध करा. २८ मोशाच्या आज्ञेप्रमाणें लेवी वंशाच्या लोकांनीं केलें आणि त्या दिवशीं अजमासें तीन हजार लोक पडले. २९ मग मोशे म्हणाला, परमेश्वराप्रीत्यर्थ आपणाला समर्पण करून हरएक पुरुषानें आपला पुत्र असो किंवा बंधु असो, त्याजवर चालून जावें म्हणजे परमेश्वर आज रोजीं तुम्हांस वरदान देईल.

३० दुसरे दिवशीं मोशे लोकांस म्हणाला कीं तुम्ही हें घोर पातक केलें आहे, तरी मी आतां परमेश्वराकडे जातों; मला तुमच्या पापाचें कदाचित् प्रायश्चित्त करितां येईल. ३१ मोशे परमेश्वराकडे परत जाऊन म्हणाला, हाय! हाय! या लोकांनीं घोर पातक केलें; यांनीं आपल्यासाठीं सोन्याचे देव बनविले. ३२ तरी आतां तूं त्यांच्या पातकाची क्षमा करिशील तर–; न करिशील तर तूं लिहिलेल्या वहींतून मला काढून टाक. ३३ परमेश्वर मोशाला म्हणाला, ज्या कोणीं मजविरुद्ध पातक केलें आहे त्यालाच मी आपल्यां वहींतून काढून टाकणार. ३४ आतां तूं जा, ज्या स्थलाविषयीं मीं तुला सांगितलें आहे तिकडे त्यांस घेऊन जा; पाहा, माझा दूत तुझ्यापुढें चालेल, तरी ज्या दिवशीं मी झडती घेईन त्या दिवशीं त्यांच्या पापाबद्दल त्यांचा समाचार घेईन. ३५ अहरोनानें बनविलेलें वासरूं लोकांनींच बनविलें होतें, म्हणून परमेश्वरानें त्यांस ताडण केलें.

३३ १ मग परमेश्वरानें मोशास सांगितलें, तूं आणि जे लोक तूं मिसर देशांतून आणिले आहेत ते, येथून निघून मार्गस्थ व्हा; व जो देश तुझ्या संततीस देईन असें अब्राहाम, इसहाक व याकोब यांस मीं शपथपूर्वक सांगितलें होतें, त्या देशाप्रत जा; २ मी तुझ्यापुढें एक दूत पाठवीन आणि कनानी, अमोरी, हित्ती, परिज्जी, हिव्वी आणि यबूसी यांस मी घालवून देईन; ३ दुधामधाचे प्रवाह वाहत आहेत त्या देशाप्रत तूं जा; तथापि तुम्ही ताठ मानेचे लोक असल्यामुळें मी तुम्हांबरोबर जाणार नाहीं; गेलों तर मार्गांत मी तुम्हांला भस्म करीन. ४ लोकांनीं हें वाईट वर्तमान ऐकलें तेव्हां ते विलाप करूं लागले; व कोणीहि आपले अलंकार व भूषणें ल्याला नाहीं. ५ परमेश्वर मोशास म्हणाला, तूं इस्राएल लोकांस सांग कीं तुम्ही ताठ मानेचे लोक आहां; मी एक पळभर तुम्हांबरोबर असलों तर मी तुम्हांला भस्म करीन; म्हणून तुम्ही आपलीं भूषणें आपल्या अंगावरून उतरून ठेवा, म्हणजे तुमचें काय करावें तें मी पाहीन. ६ त्यामुळें होरेब पर्वतापासून पुढें इस्राएल लोक भूषणविरहित राहिले.

७ मोशे छावणीबाहेर बऱ्याच अंतरावर तंबू नेऊन उभा करी; व त्यास तो दर्शनमंडप म्हणे. कोणाला परमेश्वरापाशीं कांहीं विचारावयाचें असलें म्हणजे तो छावणीबाहेरील त्या दर्शनमंडपाकडे जाई. ८ असें होई कीं जेव्हां मोशे त्या मंडपाकडे जाई तेव्हां सर्व लोक उठून आपआपल्या तंबूच्या दारांत उभे राहत आणि तो मंडपांत प्रवेश करीपर्यंत त्याजकडे नजर लावीत ९ मोशे मंडपांत प्रवेश करी तेव्हां मेघस्तंभ उतरून मंडपाच्या दारीं उभा राही, आणि परमेश्वर मोशाशी भाषण करी. १० त्या मंडपाच्या दाराशीं मेघस्तंभ उभा आहे असें सर्व लोक पाहत तेव्हां ते सगळे उठून आपआपल्या तंबूच्या दाराशीं दंडवत घालीत ११ कोणीं आपल्या मित्राशीं भाषण करावें तसें परमेश्वर मोशाशीं समोरासमोर भाषण करी. मोशे छावणीकडे परत येत असे, तरी त्याचा सेवक नूनाचा पुत्र यहोशवा हा तरुण पुरुष मंडप सोडून बाहेर येत नसे.

१२ मोशे परमेश्वरास म्हणाला, हें पाहा, तूं मला म्हणतोस कीं या लोकांस घेऊन जा; पण तूं मजबरोबर कोणास पाठविणार हें मला तूं अजून कळविलें नाहीं; तरी तूं म्हटलें आहे कीं तुझें नांव मला परिचित आहे आणि तुजवर माझी कृपादृष्टि आहे. १३ त्याकरितां मजवर तुझी कृपादृष्टि असली तर मला तुझे मार्ग

दाखीव, म्हणजे तुझी मला ओळख घडेल आणि त्यामुळें
तुझी कृपादृष्टि मजवर होईल; पाहा, हें राष्ट्र
तुझी प्रजा आहे. १४ परमेश्वर म्हणाला, मी प्रत्यक्ष
येईन आणि तुला विश्रांति देईन. १५ तो त्यास
म्हणाला, तूं प्रत्यक्ष येत नसलास तर आम्हांस येथून पुढें
नेऊं नको. १६ तुझी कृपादृष्टि मजवर व तुझ्या प्रजेवर
झाली आहे हें समजावें कशावरून? तूं आम्हांबरो-
बर आल्यानें मी व तुझे प्रजाजन पृथ्वीवरील इतर
सर्व लोकांहून वेगळे झालों आहों यावरूनच तें सम-
जावयाचें ना?

१७ परमेश्वर मोशाला म्हणाला, तुझ्या म्हणण्याप्रमाणें
हेंहि मी करीन; कारण माझी कृपादृष्टि तुजवर झाली
आहे आणि तुझें नांव मला परिचित आहे. १८ तो
म्हणाला, कृपा करून मला तुझें तेज दाखीव. १९ तो
म्हणाला, माझें सर्व सौंदर्य तुझ्यापुढें चालवीन; तुझ्या-
सन्मुख परमेश्वराच्या नामाची मी घोषणा करीन; ज्यावर
कृपा करावीसें वाटेल त्याजवर मी कृपा करीन आणि
ज्यावर दया करावीसें वाटेल त्याजवर दया करीन.
२० आणखी तो म्हणाला कीं तूं माझें मुख पाहूं शक-
णार नाहींस, कारण माझें मुख पाहून कोणी मनुष्य
जीवंत राहावयाचा नाहीं. २१ परमेश्वर म्हणाला,
मजजवळ एक जागा आहे; येथें या खडकावर उभा
राहा; २२ असें घडेल कीं, माझें तेज जवळून चाललें
असतां मी तुला खडकाच्या भेगेंत ठेवीन; मी निघून
जाईपर्यंत आपल्या हातानें तुला झांकीन; २३ मग
मी आपला हात काढून घेईन आणि तुला पाठमोरा
दिसेन; पण माझें मुख दिसावयाचें नाहीं.

३४ १ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, पहिल्या
पाट्यांसारख्या दोन दगडी पाट्या घडून तयार
कर म्हणजे तूं फोडून टाकिलेल्या पहिल्या
पाट्यांवर जीं वचनें होतीं तीं मी त्यांवर लिहीन. २ तूं
पहाटेस तयार होऊन सीनाय पर्वतावर चढून
ये आणि पर्वतशिखरावर माझ्यासमोर दाखल हो.
३ तुझ्याबरोबर कोणी चढून येऊं नये, सगळ्या
पर्वतावर कोणी मनुष्य दिसतां कामा नये, तसेंच
शेरडेंमेंढरें व गुरेंढोरें यांस डोंगराच्या कडेला चरूं
देऊं नये. ४ तेव्हां मोशानें पहिल्या पाट्यांसारख्याच
दोन दगडी पाट्या घडिल्या आणि सकाळींच उठून
त्या हातीं घेऊन परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें तो सीनाय
पर्वतावर चढून गेला. ५ तेव्हां परमेश्वर मेघाद्वारे
उतरला व तेथें त्याजपाशीं उभा राहिला, आणि त्यानें
परमेश्वरनामाची घोषणा केली. ६ परमेश्वर त्याच्या
समोरून अशी घोषणा करीत गेला: परमेश्वर, परमे-
श्वर, दयाळू व कनवाळू देव, मंदक्रोध, दयेचा व सत्याचा
सागर, ७ हजारों जणांवर दया करणारा, अधर्म,
अपराध व पाप यांची क्षमा करणारा, मुळींच गय न
करणारा, असा तो वडिलांच्या अधर्माबद्दल पुत्रपौत्रांचा
तिसऱ्या व चौथ्या पिढीपर्यंतहि समाचार घेतो.
८ तेव्हां मोशानें त्वरा करून भूमीपर्यंत लवून नमन
केलें; ९ आणि तो म्हणाला, हे प्रभू, तुझी मजवर आतां
कृपादृष्टि झाली असेल तर प्रभूनें आम्हांबरोबर
चालावें; हे लोक तर ताठ मानेचे आहेत; तथापि
आमचा अधर्म व पाप यांची क्षमा कर व आम्हांस
आपली मिरास समजून आमचा अंगीकार कर.

१० देव म्हणाला, पाहा, मी एक करार करितों; तुझ्या
सर्व लोकांदेखत मी अशीं अद्भुत कृत्यें करीन कीं
तशीं सर्व पृथ्वीभर कोणत्याहि राष्ट्रांत झालीं नाहींत;
ज्या लोकांमध्यें तूं राहशील ते सगळे परमेश्वराची
कृति पाहतील, कारण जें मी तुझ्यासाठीं करणार
आहें तें भयावह आहे. ११ जी आज्ञा मी आज तुला
देत आहें ती तुला अवश्य पाळिली पाहिजे; पाहा, मी
तुझ्यासमोरून अमोरी, कनानी, हित्ती, परिज्जी, हिव्वी
आणि यबूसी या लोकांस घालवितों. १२ तूं सावध
ऐस; ज्या देशीं तूं जात आहेस तेथल्या रहिवाश्यांशीं
कांहीं करारमदार करूं नको, केलास तर तो तुला
पाश होईल; १३ त्यांच्या वेद्या पाडून टाका,
त्यांचे स्तंभ फोडून टाका, त्यांच्या अशेरा मूर्तींचा
भंग करा; १४ कारण तुला दुसऱ्या कोणत्याहि
देवाची भक्ति करावयाची नाहीं, कां कीं ज्याचें नाम

१ अथवा: पिढ्यांवर.

ईर्ष्यावान् असें आहे, तो परमेश्वर ईर्ष्यावान् देव
होय; १५ संभाळ, देशांतील रहिवाश्यांशीं तुला
करारमदार करितां कामा नये; नाहींतर ते व्यभिचारी
मतीनें आपल्या देवांच्यामागें लागून त्यांस बलिदान
करितील, आणि त्यांतल्या कोणीं तुला बोलाविलें
असतां तूं त्यांच्या बलिदानांतलें कांहीं खाशील, १६
त्यांच्या कन्यांपैकीं कोणी तूं आपल्या पुत्रांकरितां
बायका करिशील, आणि त्यांच्या कन्या व्यभिचारी
मतीनें आपल्या देवांमागें जातील आणि तुझ्या पुत्रांस
व्यभिचारी बुद्धीनें त्यांच्या नादीं लावितील. १७ तूं
आपल्यासाठीं ओतींव देव करूं नको.

१८ बेखमीर भाकरीचा सण पाळ. माझ्या आज्ञेस
अनुसरून अबीब महिन्याच्या नियमित समयीं सात
दिवसपर्यंत तूं बेखमीर भाकरी खावी, कारण अबीब
महिन्यांत तूं मिसर देशांतून बाहेर निघालास. १९ प्रत्येक
प्रथम जन्मलेला माझा आहे; तुझ्या गुरांढोरांपैकीं बैलाचे
व मेंढराचे प्रथम नरवत्स माझे आहेत. २० गाढवाच्या
प्रथम वत्साबद्दल कोकरूं देऊन तो सोडवावा; तूं तो
सोडविणार नसलास तर त्याची मान मोडावी. आपल्या
सर्व प्रथम जन्मलेल्या पुत्रांबद्दल खंड भरावा. कोणीं
रिक्तहस्तें माझ्या दर्शनास येऊं नये.

२१ सहा दिवस तूं आपलें कामकाज कर व सातव्या
दिवशीं विसावा घे; नांगरणीच्या व हंगामाच्या समयींहि
विसावा घे. २२ तूं सप्ताहांचा सण[1] म्हणजे गव्हाच्या हंगा-
माच्या प्रथम पिकाचा सण पाळावा. तसेंच वर्षअखेर
संग्रहाचा सण पाळावा. २३ वर्षांतून तीन वेळां तुझ्यांतल्या
सर्व पुरुषांनीं इस्राएलाचा देव प्रभु परमेश्वर याचें दर्शन
घ्यावें. २४ मी तर परराष्ट्रांस तुझ्यापुढून घालवून देईन व
तुझी सरहद्द वाढवीन आणि वर्षांतून तीन वेळां तूं आपला
देव परमेश्वर याचें दर्शन घेण्यास जाशील तेव्हां कोणी
तुझ्या भूमीचा अभिलाष करणार नाहीं.

२५ माझ्या यज्ञबलीचें रक्त खमिराच्या भाकरी-
सह अर्पूं नये आणि वल्हांडण सणांतल्या यज्ञबलींतलें
कांहींएक सकाळपर्यंत राहूं देऊं नये. २६ आपल्या
जमिनींतील पहिल्या पिकाचा पहिला हिस्सा आपला
देव परमेश्वर याच्या मंदिरीं आणावा. करडास त्याच्या
आईच्या दुधांत शिजवूं नको.

२७ मग परमेश्वरानें मोशाला सांगितलें कीं हीं वचनें
लिहून ठेव, कारण याच वचनांस अनुसरून मीं तुझ्याशीं व
इस्राएल लोकांशीं करार केला आहे. २८ मोशे तेथें परमे-
श्वरासमीप चाळीस दिवस व चाळीस रात्री होता, तेवढ्या
अवधींत त्यानें अन्नोदकाचें सेवन केलें नाहीं, आणि त्या
पाट्यांवर त्यानें कराराचीं वचनें म्हणजे दहा आज्ञा लिहून
काढिल्या.

२९ मोशे आज्ञापटाच्या दोन्ही पाट्या हातीं घेऊन
सीनाय पर्वतावरून उतरून येत असतां त्याच्या
चेहऱ्यांतून, परमेश्वराशीं भाषण केल्यामुळें, तेजाचे
किरण निघत होते, याचें त्याला भान नव्हतें.
३० मोशाच्या चेहऱ्यांतून तेजाचे किरण निघत आहेत
असें अहरोनानें व सर्व इस्राएल लोकांनीं पाहिलें तेव्हां
ते त्याच्याजवळ जावयास भ्याले. ३१ मग मोशानें
अहरोन व मंडळीचे प्रमुख यांना बोलाविलें तेव्हां ते
सर्व त्याजकडे परत आले आणि मोशे त्यांजशीं भाषण
करूं लागला. ३२ नंतर सर्व इस्राएल लोक जवळ
आले आणि जें कांहीं सीनाय पर्वतावर परमेश्वरानें
त्यास सांगितलें होतें तें सगळें त्यानें त्यांस आज्ञापिलें.
३३ मोशानें त्यांजशीं बोलणें संपविल्यावर आपल्या
तोंडावर आच्छादन घातलें; ३४ पण मोशे परमे-
श्वराशीं भाषण करण्यास त्याजसमोर आंत जाई तेव्हां
तो बाहेर येईपर्यंत आपल्या तोंडावरलें आच्छादन
काढीत असे; आणि बाहेर येऊन जी कांहीं आज्ञा
त्याला होई ती तो इस्राएल लोकांस सांगत असे. ३५
इस्राएल लोक मोशाच्या तोंडाकडे पाहत तों त्याच्या
त्वचेंतून तेजाचे किरण निघतांना दिसत; परमेश्वराशीं
संभाषण करण्यास मोशे आंत जाईपर्यंत तो आपल्या
तोंडावर आच्छादन घालीत असे.

३५ १ मोशानें इस्राएल लोकांची सगळी मंडळी
जमवून त्यांस म्हटलें, ज्या गोष्टी करण्याविषयीं
परमेश्वरानें आज्ञा केली आहे त्या ह्या: २ सहा

[1] मूळ शब्दाचा अर्थ हाज किंवा यात्रा.

दिवस काम करावें, पण सातवा दिवस तुम्हांला पवित्र दिवस, परमेश्वराप्रीत्यर्थ परमविश्रामाचा दिवस शब्बाथ होय; त्या दिवशीं जो कोणी काम करील त्यास जिवें मारावें. ३ शब्बाथ दिवशीं तुम्हीं आपल्या घरीं विस्तव पेटवूं नये.

४ मोशे इस्राएल लोकांच्या सर्व मंडळीस म्हणाला, परमेश्वरानें आज्ञा दिली ती ही: ५ तुम्हीं आपल्याकडचें अर्पण परमेश्वराप्रीत्यर्थ आणावें; ज्याची मनापासून इच्छा असेल त्यानें परमेश्वरासाठीं अर्पण आणावें; सोनें, रुपें, पितळ; ६ निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांचें सूत व तलम सणाचें कापड, बकऱ्यांचे केस; ७ मेंढ्यांची लाल रंग दिलेलीं कातडीं, तहशाचीं कातडीं, बाभळीचें लाकूड, ८ दिव्याचें तेल, अभिषेकाच्या तेलासाठीं आणि सुगंधी धुपासाठीं मसाले, ९ एफोद व उरपट यांत खचण्यासाठीं गोमेदमणी आणि इतर रत्नें आणावीं; १० आणि तुमच्यापैकीं जे कोणी सुबुद्ध हृदयाचे असतील त्या सर्वांनीं येऊन ज्या ज्या वस्तु करण्याची आज्ञा परमेश्वरानें दिली आहे त्या सर्व तयार कराव्या, त्या ह्या: ११ निवासमंडप, त्याचा तंबू व त्यावरील आच्छादन, त्याचे आंकडे, फळ्या, अडसर, खांब व खुरच्या; १२ कोश व त्याचे दांडे, दयासन व अंतरपट; १३ मेज व त्याचे दांडे, त्यावरील सर्व पात्रें व समर्पित केलेली भाकर; १४ प्रकाशासाठीं दीपवृक्ष व त्याचीं उपकरणें, दिवे आणि दिव्याचें तेल; १५ धूपवेदी, तिचे दांडे, अभिषेकाचें तेल, सुगंधी धूप, निवासमंडपाच्या द्वारासाठीं द्वारपट; १६ होमवेदी व तिची पितळेची जाळी, दांडे व तिचें इतर साहित्य, गंगाळ व त्याची बैठक; १७ अंगणाचे पडदे, त्याचे खांब व खुरच्या व अंगणाच्या प्रवेशद्वारासाठीं पडदे; १८ निवासमंडप व अंगण यांसाठीं मेखा व तणावे; १९ पवित्रस्थानांत सेवा करण्यासाठीं उत्तम विणिलेलीं वस्त्रें व याजकाचें काम करण्यासाठीं अहरोन याजकाचीं पवित्र वस्त्रें आणि त्याच्या पुत्रांचीं वस्त्रें.

२० मग इस्राएल लोकांची सर्व मंडळी मोशासमोरून निघून गेली. २१ ज्यांच्या अंतःकरणांत स्फूर्ति झाली व ज्या कोणाची मनःपूर्वक इच्छा झाली त्यानें दर्शनमंडपाचें काम, त्यांतील सगळी सेवा आणि पवित्र वस्त्रें यांप्रीत्यर्थ परमेश्वराला अर्पण आणिलें. २२ ज्यांना ज्यांना मनापासून इच्छा झाली ते सगळे स्त्रीपुरुष आले, त्यांनीं नथा, कुंडलें, मुद्रिका, कंकणें असे सोन्याचे सर्व प्रकारचे दागिने आणिले; परमेश्वराला सुवर्णार्पण करणारा प्रत्येक मनुष्यहि आला. २३ निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांचें सूत व तलम सणाचें कापड, बकऱ्यांचे केस, तांबडा रंग दिलेलीं मेंढ्यांचीं कातडीं व तहशाचीं कातडीं ज्या प्रत्येक पुरुषापाशीं होतीं तीं तो घेऊन आले. २४ चांदी व पितळ यांचें अर्पण करणाऱ्या प्रत्येकानें परमेश्वराप्रीत्यर्थ अर्पणें आणिलीं आणि सेवेच्या कामासाठीं उपयोगीं पडावयाजोगें बाभळीचें लाकूड ज्या प्रत्येक पुरुषापाशीं होतें तें तो घेऊन आला. २५ ज्या स्त्रिया सुबुद्ध हृदयाच्या होत्या त्या सर्वांनीं निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांचें सूत आणि तलम सणाचें कापड आपल्या हातांनीं विणिलें होतें तें आणिलें; २६ आणि ज्या स्त्रियांच्या हृदयाला स्फूर्ति होऊन त्यांस बुद्धि झाली त्या सर्वांनीं बकऱ्यांचे केस विणिले. २७ सरदारमंडळीनें एफोद व उरपट यांत खचण्यासाठीं गोमेदमणी व इतर रत्नें, २८ आणि दिव्यासाठीं, अभिषेकासाठीं व सुगंधी धुपासाठीं मसाला व तेल आणिलें. २९ जें करण्याविषयीं परमेश्वरानें मोशाच्या द्वारें आज्ञा दिली होती त्या सर्वांसाठीं इस्राएल लोकांनीं स्वसंतोषानें परमेश्वराप्रीत्यर्थ अर्पणें आणिलीं, ज्या ज्या स्त्रीपुरुषांच्या अंतःकरणांत स्फूर्ति झाली त्यांनीं त्यांनीं हीं अर्पणें आणिलीं.

३० मग मोशे इस्राएल लोकांस म्हणाला, पाहा, यहूदावंशांतील उरीचा पुत्र व हूरचा नातू बसालेल यास परमेश्वरानें नांव घेऊन बोलाविलें आहे; ३१ आणि त्यानें त्यास देवाच्या आत्म्यानें परिपूर्ण करून अक्कल, बुद्धि, ज्ञान व सर्व तऱ्हेचें कसब हीं दिलीं आहेत; ३२ तो कलाकुसरीचीं कामें करील; सोनें, रुपें व पितळ यांचीं कामें करील; ३३ जडावासाठीं रत्नांस पैलू पाडील; लाकडाचें नकशीकाम करील आणि अशा सर्व प्रकारचीं

ागिरीचीं कामें करील. ३४ परमेश्वरानें त्याच्या
ीं आणि दानवंशांतील अहिसामाकाचा पुत्र अहलि-
ा यांच्या ठायीं शिक्षण देण्याचें सामर्थ्य ठेविलें आहे.
५ कोरींव काम करणारे चतुर कारागीर, निळ्या,
मळ्या व किरमिजी रंगांच्या व तलम सणाच्या
ड्यावर कशिदा काढणारे, वीणकाम करणारे, सर्व
ीचें कसबी काम करणारे व चातुर्याच्या कामाची
ना करणारे अशांचीं सर्व कारागिरीचीं कामें
ण्यासाठीं या दोघांचें हृदय अकलेनें परिपूर्ण केलें आहे.

३६ १ परमेश्वराच्या सर्व आज्ञांप्रमाणें पवित्र-
स्थानाच्या सेवेसाठीं सर्व तऱ्हेचें काम कसें
करावें तें समजावें म्हणून बसालेल, अहलियाब
णि प्रत्येक सुबुद्ध मनुष्य यांच्या ठायीं परमेश्वरानें
द्ध व समज घातली आहे; त्यांनीं हें काम करावें.
२ नंतर बसालेल व अहलियाब यांस आणि ज्या
द्ध मनुष्यांच्या हृदयांत परमेश्वरानें बुद्धि घातली
ती व ज्यांस हें कार्य येऊन करण्याची स्फूर्ति झाली
ती त्यांस मोशानें बोलाविलें; ३ इस्राएल लोकांनीं
वित्रस्थानाच्या सेवेसाठीं व तें बांधण्यासाठीं जें एकंदर
र्पण आणिलें होतें तें त्यांनीं मोशाच्या पुढून घेतलें.
कांनीं रोज सकाळीं आपलीं स्वसंतोषाचीं अर्पणें
ाजपाशीं आणण्याचा क्रम चालू ठेविला. ४ जे बुद्धि-
न् पुरुष पवित्रस्थानाचें सगळें काम करीत होते ते
ी आपआपलें काम सोडून मोशाकडे आले; ५ ते
ाला म्हणाले, परमेश्वरानें जें काम करण्याची आज्ञा
ली आहे तें करण्यास जी सामग्री लागते तीपेक्षां
कळ अधिक लोक आणीत आहेत. ६ तेव्हां
शानें सर्व छावणीभर असा हुकूम फर्माविला कीं
णा पुरुषानें किंवा स्त्रीनें पवित्रस्थानाप्रीत्यर्थ आणखी
ावें वगैरे काम करून आणूं नये. याप्रमाणें आणखी
र्पणें आणण्यास प्रतिबंध झाला. ७ त्यांच्या हातीं जी
ामग्री होती ती तें सर्व काम करण्यास पुरून उरेसी होती.
८ त्यांतले जे चतुर पुरुष काम करीत होते त्या
ांनीं दहा पडद्यांचा निवासमंडप केला; हे पडदे
ांनीं कातलेल्या तलम सणाच्या कापडाचे आणि निळ्या,
जांभळ्या व किरमिजी रंगांच्या सुताचे तयार केले व
त्यांत चतुर कारागिराकडून करूब काढविले. ९ एकेका
पडद्याची लांबी अठ्ठावीस हात, व रुंदी चार हात होती;
ते सर्व पडदे एकाच मापाचे होते. १० त्यानें त्यांतले पांच
पडदे एकमेकांशीं जोडिले, व दुसरे पांच पडदे एक-
मेकांशीं जोडिले. ११ त्यानें जेथें एक पडदा जोडिला
होता तेथें पडद्याच्या किनारीवर निळ्या सुताचीं बिरडीं
लाविलीं, तसेंच दुसऱ्या पडद्याच्या किनारीवरहि तशींच
बिरडीं लाविलीं. १२ एका पडद्याला त्यानें पन्नास
बिरडीं केलीं व दुसऱ्या पडद्याच्या किनारीवरहि पन्नास
बिरडीं केलीं; हीं बिरडीं समोरासमोर होतीं. १३ तसेंच
त्यानें सोन्याचे पन्नास आंकडे बनविले; त्या आंकड्यांनीं
त्यानें पडदे अशा प्रकारें जोडिले कीं सर्व मिळून
निवासमंडप अखंड झाला. १४ निवासमंडपावर तंबू
असावा म्हणून बकऱ्याच्या केसांचे अकरा पडदे त्यानें
बनविले. १५ एकेका पडद्याची लांबी तीस हात व
रुंदी चार हात होती; हे अकरा पडदे एकाच मापाचे
होते. १६ त्यानें पांच पडदे वेगळे जोडिले व सहा पडदे
वेगळे जोडिले. १७ जोडून केलेल्या एका शेवटल्या
पडद्याच्या किनारीवर त्यानें पन्नास बिरडीं केलीं, तशींच
दुसऱ्या कनातीच्या शेवटल्या पडद्याच्या किनारीवरहि
त्यानें पन्नास बिरडीं केलीं. १८ हा तंबू जोडून एक करण्या-
साठीं त्यानें पितळेचे पन्नास आंकडे बनविले. १९ या
तंबूसाठीं तांबडा रंग दिलेल्या मेंढ्यांच्या कातड्यांचें
एक आच्छादन व त्यावर तहशाच्या कातड्यांचें एक
आच्छादन केलें.

२० मग निवासमंडपास उभ्या लावण्यासाठीं त्यानें
बाभळीच्या लाकडाच्या फळ्या केल्या. २१ प्रत्येक
फळी दहा हात लांब व दीड हात रुंद होती.
२२ प्रत्येक फळी दुसऱ्या फळीशीं जोडण्यासाठीं त्यानें
तिला दोन दोन कुसें केलीं; त्यानें निवासमंडपाच्या
सर्व फळ्या अशाच केल्या. २३ निवासमंडपासाठीं ज्या
फळ्या त्यानें केल्या त्यांपैकीं वीस दक्षिण बाजूस
लाविल्या; २४ त्या वीस फळ्यांच्या खालीं लावण्या-
साठीं चांदीच्या चाळीस खुर्च्या केल्या; एकेका

फळीच्या खालीं तिच्या दोन कुसांसाठीं त्यानें दोन दोन खुरच्या केल्या. २५ त्याप्रमाणेंच निवासमंडपाच्या दुसऱ्या म्हणजे उत्तर बाजूसाठीं त्यानें वीस फळ्या केल्या; २६ त्यानें त्यांसाठीं चांदीच्या चाळीस खुरच्या केल्या म्हणजे एकेका फळीच्या खालीं दोन दोन खुरच्या. २७ निवासमंडपाच्या मागल्या म्हणजे पश्चिम बाजूसाठीं त्यानें सहा फळ्या केल्या, २८ आणि मागल्या बाजूस निवासमंडपाच्या कोपऱ्यांसाठीं त्यानें दोन फळ्या केल्या. २९ ह्या फळ्या खालपासून दोन दोन असून त्या दोन्ही वरच्या भागीं एकेका कडीनें त्यानें जुळविल्या; दोन्ही कोपऱ्यांसाठीं त्यानें अशा दोन फळ्या केल्या. ३० या प्रकारें आठ फळ्या व त्यांना चांदीच्या सोळा खुरच्या झाल्या, अर्थात् एकेका फळीखालीं दोन दोन खुरच्या होत्या. ३१ त्यानें बाभळीच्या लाकडाचे अडसर तयार केले, निवासमंडपाच्या एका बाजूच्या फळ्यांसाठीं पांच, ३२ दुसऱ्या बाजूसाठीं पांच आणि निवासमंडपाच्या पश्चिमेच्या म्हणजे मागल्या बाजूसाठीं पांच; ३३ आणि त्यानें फळ्यांच्या मध्यभागीं लावावयाचा मधला अडसर तंबूच्या एका शेवटापासून दुसऱ्या शेवटापर्यंत पोंहचे असा केला. ३४ त्या फळ्या त्यानें सोन्यानें मढविल्या, अडसर लावण्याच्या कड्या सोन्याच्या बनविल्या आणि अडसरहि सोन्यानें मढविले.

३५ मग त्यानें निळ्या, जांभळ्या आणि किरमिजी रंगांच्या सुताचा आणि तलम सणाच्या कापडाचा एक अंतरपट बनविला व त्यांत चतुर कारागिराकडून करूब काढविले; ३६ आणि त्यासाठीं त्यानें बाभळीच्या लाकडाचे चार खांब केले व ते सोन्यानें मढविले; त्यांच्या आंकड्या सोन्याच्या केल्या आणि त्यांच्यासाठीं चार चांदीच्या खुरच्या ओतिल्या. ३७ त्यानें तंबूच्या दारासाठीं निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांच्या सुताचा व कातलेल्या तलम सणाच्या कापडाचा वेलबुट्टीदार पडदा बनविला; ३८ व त्यानें त्याचे पांच खांब व आंकडे बनविले; त्यांचे शिरोभाग व त्यांचीं बंधनें सोन्यानें मढविलीं; आणि त्यांच्या पांच खुरच्या पितळेच्या बनविल्या.

३७ १ मग बसालेल यानें बाभळीच्या लाकडाचा एक कोश तयार केला; त्याची लांबी अडीच हात, रुंदी दीड हात आणि उंची दीड हात होती; २ त्यानें तो आंतून व बाहेरून शुद्ध सोन्यानें मढविला; त्यास सभोवतीं सोन्याचा कंगोरा केला. ३ त्याच्या चारी पायांस लावण्यासाठीं त्यानें सोन्याच्या चार कड्या ओतून एका बाजूस दोन व दुसऱ्या बाजूस दोन लाविल्या. ४ त्यानें बाभळीच्या लाकडाचे दांडे करून तेहि सोन्यानें मढविले. ५ कोश उचलावयासाठीं ते दांडे त्यानें त्याच्या दोहों बाजूंच्या कड्यांत घातले. ६ त्यानें शुद्ध सोन्याचें दयासन बनविलें; त्याची लांबी अडीच हात व रुंदी दीड हात होती. ७ त्यानें सोनें घडवून दोन करूब केले; ते दयासनाच्या दोन्ही बाजूंस केले; ८ एक करूब एका बाजूस व दुसरा करूब दुसऱ्या बाजूस केला; करूब व दयासन अखंड असून ते त्यानें दोहों बाजूंस केले. ९ त्या करूबांचे पंख असे पसरले होते कीं त्यांनीं तें दयासन झाकलें होतें; त्यांचीं मुखें समोरासमोर असून त्यांची दृष्टि दयासनाकडे लागलेली होती.

१० त्यानें बाभळीच्या लाकडाचें मेज बनविलें, त्याची लांबी दोन हात, रुंदी एक हात व उंची दीड हात होती; ११ त्यानें तें शुद्ध सोन्यानें मढविलें व त्याच्या सभोवार सोन्याचा कंगोरा केला; १२ आणि त्यानें त्याच्यासाठीं चार बोटें रुंदीची एक पाळ केली व त्या पाळीस सभोवार सोन्याचा कंगोरा केला. १३ त्याच्यासाठीं सोन्याच्या चार कड्या ओतून तयार केल्या व त्याच्या चारी पायांवरल्या चार कोपऱ्यांस त्या लाविल्या. १४ ह्या कड्या त्या पाळीच्या लगत होत्या; मेज उचलावयासाठीं त्यांत दांडे घातले. १५ मेज उचलावयासाठीं बाभळीच्या लाकडाचे दांडे केले व ते सोन्यानें मढविले; १६ आणि त्यानें मेजावरलीं पात्रें म्हणजे तबकें, धुपाटणीं, सुरया, व पेयार्पणाचे प्याले हीं सर्व शुद्ध सोन्याचीं केलीं.

१७ त्यानें शुद्ध सोन्याचा दीपवृक्ष बनविला, व हा

दीपवृक्ष, त्याची बैठक, त्याचा दांडा, त्याच्या वाट्या, त्याचीं बोंडें व त्याचीं फुलें हीं सर्व एकाच अखंड तुकड्याचीं घडविलीं; १८ त्या दीपवृक्षाला सहा शाखा होत्या; एका बाजूस तीन व दुसऱ्या बाजूस तीन; १९ प्रत्येक शाखेला बदामाच्या फुलांसारख्या तीन तीन वाट्या बोंडांफुलांसह केल्या आणि दुसऱ्या बाजूच्या त्याच्या जोडीच्या प्रत्येक शाखेलाहि बदामाच्या फुलांसारख्या तीन तीन वाट्या बोंडांफुलांसह केल्या; दीपवृक्षांतून निघालेल्या सहा शाखांची रचना अशीच होती. २० दीपवृक्षाच्या दांडीला बदामाच्या फुलांसारख्या बोंडांफुलांसह चार वाट्या होत्या; २१ दीपवृक्षांतून निघालेल्या सहा शाखांस दोन दोन शाखांच्या खालीं एक एक बोंड असून तीं अखंड अशीं होतीं. २२ बोंडें व शाखा हीं सर्व अखंड असून तो सबंध दीपवृक्ष शुद्ध सोन्याचा एकच तुकडा ठोकून घडिला. २३ त्यानें त्या दीपवृक्षाचे सात दिवे, त्याचे चिमटे व गुलदानें शुद्ध सोन्याचीं केलीं. २४ त्यानें तो दीपवृक्ष व त्याचें सर्व उपकरणसाहित्य एक किक्कार शुद्ध सोन्याचें केलें.

२५ मग त्यानें बाभळीच्या लाकडाची धूपवेदी केली; तिची लांबी एक हात व रुंदी एक हात अशी ती चौरस होती; तिची उंची दोन हात होती व तिचीं शृंगें अंगचींच होतीं. २६ त्यानें त्या वेदीचा वरचा भाग, तिच्या चारी बाजू व तिचीं शृंगें शुद्ध सोन्यानें मढविलीं व तिला सभोवार सोन्याचा कंगोरा केला. २७ त्यानें सोन्याच्या कड्या करून तिच्या कंगोऱ्याच्या खालीं तिच्या दोन्ही भागांस, दोन कोनांस वेदी उचलून नेण्याचे दांडे घालण्यासाठीं दोन दोन लाविल्या. २८ त्यानें बाभळीच्या लाकडाचे दांडे करून ते सोन्यानें मढविले. २९ त्यानें पवित्र अभिषेकाचें तेल आणि सुगंधी द्रव्यांचा शुद्ध धूप गंधी बनवितात तसा बनविला.

३८ १ त्यानें होमवेदी बाभळीच्या लाकडाची केली; तिची लांबी पांच हात व रुंदी पांच हात अशी ती चौरस असून तिची उंची तीन हात होती. २ त्यानें तिच्या चारी कोपऱ्यांस चार शृंगें बनविलीं; तीं तिच्या अंगचींच होतीं; त्यानें ही वेदी पितळेनें मढविली; ३ आणि त्यानें वेदीचीं सर्व पात्रें म्हणजे हंड्या, पावडी, कटोरे, कांटे, अग्निपात्रें हीं सर्व पितळेचीं बनविलीं. ४ वेदीला त्यानें सभोवार कंगोऱ्याच्या खालीं पितळेच्या जाळीची एक चाळणी केली, ती वेदीच्या खालून तिच्या अर्ध्या उंचीपर्यंत होती. ५ त्यानें पितळेच्या चाळणीच्या चारी कोपऱ्यांना दांडे घालण्यासाठीं चार कड्या ओतून तयार केल्या ६ त्यानें बाभळीच्या लाकडाचे दांडे करून ते पितळेनें मढविले. ७ वेदी उचलण्यासाठीं तिच्या बाजूंच्या कड्यांत त्यानें दांडे घातले; मध्यें पोकळ ठेवून बाजूस फळ्या बसविलेली वेदी बनविली.

८ त्यानें गंगाळ व त्याची बैठक पितळेची बनविली. दर्शनमंडपाच्या दाराशीं ज्या स्त्रिया सेवा करीत त्यांच्या आरशांची ही पितळ होती.

९ त्यानें अंगण तयार केलें; त्याच्या दक्षिण बाजूला कातलेल्या तलम सणाचे विणिलेले पडदे एकंदर शंभर हात होते; १० त्यांना वीस खांब होते व त्या खांबांना पितळेच्या वीस खुरच्या होत्या; खांबांचे आंकडे व त्यांचीं बंधनें चांदीचीं होतीं. ११ त्याच्या उत्तर बाजूसहि शंभर हात लांबीचे पडदे होते; त्यासहि वीस खांब असून त्यांस पितळेच्या वीस खुरच्या होत्या; खांबांचे आंकडे व त्यांचीं बंधनें चांदीचीं होतीं; १२ आणि पश्चिम बाजूस पन्नास हात लांब पडदे होते; त्यांस दहा खांब व दहा खुरच्याहि होत्या; ह्या खांबांचे आंकडे व बंधनें चांदीचीं होतीं. १३ पूर्वेकडील बाजू पन्नास हात ठेवली. १४ अंगणाच्या द्वाराच्या एका बाजूला पंधरा हात लांबीचे पडदे होते, त्यांना खांब तीन व खुरच्याहि तीन होत्या, १५ आणि अंगणाच्या द्वाराची दुसरी बाजूहि तशीच होती; अंगणाच्या द्वाराच्या ह्या बाजूस व त्या बाजूस पंधरा पंधरा हात पडदे होते, त्यांना खांब तीन तीन व त्यांच्या खुरच्याहि तीन तीन होत्या. १६ अंगणाच्या सभोवतालचे सर्व पडदे कातलेल्या तलम सणाच्या कापडाचे होते. १७ खांबांच्या खुरच्या पितळेच्या

आणि त्यांचे आंकडे व त्यांचीं बंधनें चांदीचीं होतीं; त्यांचे मथळे चांदीनें मढविले होते आणि अंगणाचे सर्व खांब चांदीच्या बंधनांनीं जोडिले होते. १८ अंगणाच्या द्वाराचा पडदा वेलबुट्टीदार असून निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांच्या सुताचा आणि कातलेल्या तलम सणाच्या कापडाचा होता; त्याची लांबी वीस हात व त्याची रुंदीकडील उंची अंगणाच्या कनातीइतकी पांच हात होती. १९ त्याचे खांब चार आणि त्यांना पितळेच्या खुरच्या चार होत्या; त्यांचे आंकडे चांदीचे असून त्यांचे मथळे चांदीनें मढविले होते व त्यांचीं बंधनें चांदीचीं होतीं. २० निवासमंडपाच्या आणि अंगणाच्या सभोवार असलेल्या सर्व मेखा पितळेच्या होत्या.

२१ निवासमंडपाचें म्हणजे आज्ञापटाच्या निवासमंडपाचें जें सामान लेव्यांच्या सेवेकरितां केलें त्याची यादी मोशाच्या सांगण्यावरून अहरोन याजकाचा पुत्र इथामार यानें केली ती हीच. २२ ज्या ज्या वस्तु करण्याविषयीं परमेश्वरानें मोशाला आज्ञा दिली होती त्या यहूदा वंशांतील हुराचा नातू व उरीचा पुत्र बसालेल यानें बनविल्या. २३ त्याच्या जोडीला दानवंशांतील अहिसामाकाचा पुत्र अहलियाब हा कोरींव काम करणारा चतुर कारागीर असून निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांच्या व तलम सणाच्या कापडावर कशिदा काढणारा होता.

२४ पवित्रस्थानाच्या सर्व कामासाठीं लागलेलें लोकांनीं अर्पण केलेलें सगळें सोनें एकोणतीस किक्कार होतें, आणि पवित्रस्थानांतील शेकेलाच्या चलनाप्रमाणें सातशें तीस शेकेल होतें. २५ मंडळीपैकीं ज्यांची नोंद करण्यांत आली होती त्यांनीं जी चांदी अर्पिली ती शंभर किक्कार भरली, आणि पवित्रस्थानांतील शेकेलाच्या चलनाप्रमाणें सतराशें पंचाहत्तर शेकेल भरली; २६ म्हणजे जितके वीस वर्षांचे व त्यांहून अधिक वर्षांचे होते त्यांची गणती झाली तेव्हां, ते सहा लाख साडेतीन हजार पन्नास भरले. त्यांतल्या एकेकामागें पवित्रस्थानांतील शेकेलाच्या चलनाप्रमाणें एकएक बेका म्हणजे अर्धा शेकेल मिळाला. २७ ती शंभर किक्कार चांदी पवित्रस्थानांतील खुरच्या व पडद्याच्या खुरच्या ओतण्यास लागली; एकेका खुरचीला एक एक किक्कार अशा शंभर किक्कारांच्या शंभर खुरच्या केल्या. २८ आणि बाकीच्या सतराशें पंचाहत्तर शेकेल चांदीचे खांबांसाठीं आंकडे केले; खांबांच्या मथळ्यांवर मढवणी केली व त्यासाठीं बंधनें बनविलीं. २९ अर्पण केलेली पितळ सत्तर किक्कार व दोन हजार चारशें शेकेल होती. ३० ती पितळ घेऊन दर्शनमंडपाच्या द्वाराच्या खुरच्या, पितळी वेदी, पितळी चाळणी आणि वेदीचें सर्व सामान, ३१ व अंगणाच्या चारी बाजूंच्या खुरच्या, त्याच्या दाराच्या खुरच्या आणि निवासमंडप व अंगण यांच्या चोहों बाजूंच्या मेखा बनविल्या.

३९ १ त्यांनीं पवित्रस्थानांतील सेवेसाठीं निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांचें सूत विणून वस्त्रें केलीं, आणि अहरोनासाठीं पवित्र वस्त्रें केलीं; परमेश्वरानें मोशाला सांगितलें होतें त्याप्रमाणें हें केलें.

२ त्यांनीं एफोद सोन्याच्या जराचें आणि निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांच्या सुताचें व तलम सणाच्या कापडाचें तयार केलें. ३ त्यांनीं सोनें ठोकून त्याचे पातळ पत्रे केले आणि ते पत्रे कापून त्याची तार केली आणि ती चतुर कारागिराकडून निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांच्या व तलम सणाच्या कापडांत भरिली. ४ त्यांनीं एफोदाला खांदपट्ट्या जोडिल्या; त्याचीं दोन्ही शेवटें जोडिलीं. ५ एफोद बांधावयासाठीं त्याजवर जी कुशलतेनें विणिलेली पट्टी असते तिची बनावट त्याच्यासारखीच असून ती अखंड तुकड्याची केली; ती सोन्याच्या जराची आणि निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांच्या सुताची आणि कातलेल्या तलम सणाच्या कापडाची केली; परमेश्वरानें मोशाला सांगितलें होतें त्याप्रमाणें हें केलें.

६ मुद्रेवर छाप कोरितात तशीं त्यांनीं गोमेद मण्यांवर इस्राएलाच्या पुत्रांचीं नांवें कोरिलीं; ते मणी सोन्याच्या जाळीदार कोंदणांत बसविले, ७ इस्राएल-

१ निर्गम २५ : ३९ पाहा.

पुत्रांचीं स्मारकरत्नें व्हावीं म्हणून तीं एफोदाच्या
खांदपट्ट्यांवर लाविलीं; परमेश्वरानें मोशाला सांगितलें
होतें त्याप्रमाणें हें केलें.
८ त्यानें एफोदाप्रमाणेंच कातलेल्या सोन्याच्या
जराचा आणि निळ्या, जांभळ्या व किरमिजी रंगांच्या
सुताचा व कातलेल्या तलम सणाच्या कापडाचा उरपट
चतुर कारागिराकडून बनविला. ९ तो चौरस होता;
हा उरपट त्यांनीं दुहेरी केला; तो दुहेरी असून एक
वीत लांब व एक वीत रुंद होता. १० त्यांत रत्नांच्या
चार रांगा बसविल्या; पहिल्या रांगेंत लाल, पुष्कराज
व माणीक; ११ दुसऱ्या रांगेंत पाच, नीलमणि व
हिरा; १२ तिसऱ्या रांगेंत तृणमणि, सूर्यकांत व
पद्मराग; १३ आणि चौथ्या रांगेंत लसणा, गोमेद
व यास्फे; हीं रत्नें सोन्याच्या जाळीदार कोंदणांत
खचिलीं. १४ इस्राएलपुत्रांच्या नांवांच्या संख्येएवढीं
हीं रत्नें होतीं; त्यांच्या संख्येप्रमाणें बारा नांवें होतीं.
मुद्रा जशी खोदितात तसें बारा वंशांपैकीं एकेकाचें
नांव एकेका रत्नावर त्यांनीं खोदिलें. १५ दोरीसारखा
पीळ घातलेल्या शुद्ध सोन्याच्या सांखळ्या करून
उरपटाला लाविल्या. १६ सोन्याचीं दोन जाळी-
दार कोंदणें आणि दोन कड्या करून उरपटाच्या
दोहों शेवटांस लाविल्या. १७ उरपटाच्या शेवटांस
लाविलेल्या दोन्ही कड्यांत सोन्याच्या पीळ घातलेल्या
सांखळ्या घातल्या. १८ पीळ घातलेल्या दोन्ही
सांखळ्यांचीं दुसरीं दोन शेवटें दोन्ही जाळीदार कोंदणांत
जडून त्या एफोदाच्या दोन्ही खांदपट्ट्यांवर पुढल्या
भागीं लाविलीं. १९ सोन्याचे आणखी दोन कोयंडे
करून उरपटाच्या दोन्ही शेवटांवर म्हणजे एफोदाच्या
आंतल्या बाजूस असलेल्या कोरीवर लाविले. २०
सोन्याचे आणखी दोन कोयंडे करून एफोदाच्या
दोन्ही खांदपट्ट्यांवर खालून त्याच्यासमोर त्याच्या
सांध्याजवळ विणिलेल्या बुट्टीदार पट्टीवर लाविले. २१
त्यांनीं त्या उरपटाचे कोयंडे एफोदाच्या कोयंड्यांना
निळ्या फितीनें असे बांधिले कीं एफोदाच्या बुट्टीदार
पट्टीवर तो राहावा आणि त्यापासून तो अलग होऊं नये;
परमेश्वरानें मोशाला सांगितलें होतें त्याप्रमाणें हें केलें.
२२ त्यानें एफोदाबरोबर ल्यावयाचा झगा विणून सबंध
निळ्या रंगाचा केला; २३ मध्यभागीं चिलखताच्या-
प्रमाणें एक भोक ठेविलें, आणि तो फाटूं नये म्हणून
त्या भोकाच्या किनारीला समोवार गोट घातला.
२४ त्यांनीं त्या झग्याच्या खालच्या घेरांत समोवार निळ्या,
जांभळ्या व किरमिजी रंगांच्या कातलेल्या सुताचीं
डाळिंबें काढिलीं; २५ शुद्ध सोन्याचीं घुंगरें केलीं
आणि झग्याच्या खालच्या घेरांत समोवार दोन दोन
डाळिंबांच्या दरम्यान एकएक अशीं तीं लाविलीं;
२६ म्हणजे झग्याच्या खालच्या घेरांत समोवार एक
सोन्याचें घुंगरूं व एक डाळिंब, पुन्हां एक सोन्याचें
घुंगरूं व एक डाळिंब अशीं तीं लाविलीं; हा झगा
सेवा करण्याच्या समयीं घालीत; परमेश्वरानें मोशाला
सांगितलें होतें त्याप्रमाणें हें केलें.
२७ अहरोन व त्याचे पुत्र यांच्यासाठीं तलम
सणाच्या विणिलेल्या कापडाचे अंगरखे, २८ आणि
तलम सणाचा मंदील, तलम सणाचे सुंदर फेटे,
कातलेल्या तलम सणाचे चोळणे, २९ कातलेल्या
तलम सणाचा आणि निळ्या, जांभळ्या व किरमिजी
रंगांचा कशिदा काढलेला कमरबंद हीं बनविलीं; परमे-
श्वरानें मोशाला सांगितलें होतें त्याप्रमाणें हें केलें.
३० त्यांनीं पवित्र मुकुटाची पट्टिका शुद्ध सोन्याची
केली व मुद्रा कोरितात तशीं तिच्यावर हीं अक्षरें
कोरिलीं: **परमेश्वराप्रीत्यर्थ पवित्र.** ३१ ती
मंदिलावर बांधितां यावी म्हणून तिला त्यांनीं निळ्या
रंगाची फीत लाविली; परमेश्वरानें मोशाला सांगितलें
होतें त्याप्रमाणें त्यांनीं हें केलें.
३२ या प्रकारें दर्शनमंडपाच्या निवासमंडपाचें
सर्व काम समाप्त झालें; परमेश्वरानें मोशाला आज्ञा दिली
होती तिच्याबरहुकूम इस्राएल लोकांनीं सर्व कांहीं केलें.
३३ त्यांनीं मग तो निवासमंडप मोशाकडे आणिला;
तंबू व त्याचें सर्व सामान म्हणजे त्याचे आंकडे, त्याच्या
फळ्या, त्याचे अडसर, त्याचे खांब व त्याच्या खुरच्या;
३४ आणि मेंढ्यांचीं लाल रंगविलेलीं कातडीं व तहशाचीं

कातडीं आणि अंतरपट; ३५ आज्ञापटाचा कोश व
त्याचे दांडे आणि दयासन; ३६ मेज, त्यावरील सर्व
सामान व समर्पित केलेली भाकर; ३७ शुद्ध दीपवृक्ष,
त्याचे दिवे म्हणजे रांगेनें लावावयाचे दिवे, त्याचीं सर्व
उपकरणें आणि दिव्यांसाठीं तेल; ३८ सोन्याची वेदी,
अभिषेकाचें तेल, सुगंधी धूप आणि तंबूच्या दारासाठीं
पडदा; ३९ पितळी वेदी आणि तिची पितळेची
जाळी, तिचे दांडे व तिचीं सर्व पात्रें, गंगाळ व त्याची
बैठक; ४० अंगणाचे पडदे, खांब व खुरच्या,
अंगणाच्या दाराचा पडदा, तणावे, मेखा आणि
निवासमंडपाच्या व दर्शनमंडपाच्या सेवेसाठीं लागणारें
सर्व साहित्य; ४१ पवित्रस्थानांत सेवा करण्यासाठीं
विणिलेलीं तलम वस्त्रें, अहरोन याजकाचीं पवित्र वस्त्रें
आणि याजकाचें काम चालविण्यासाठीं त्याच्या पुत्रांचीं
वस्त्रें हीं सर्व त्यांनीं आणिलीं. ४२ परमेश्वरानें मोशाला
आज्ञा दिली होती तिच्याबरहुकूम इस्राएल लोकांनीं
सगळें काम केलें. ४३ मोशानें हें सर्व काम पाहिलें; तें
त्यांनीं परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें केलें आहे असें त्याच्या
नजरेस आल्यावर त्यानें त्यांस आशीर्वाद दिला.

१ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ पहिल्या
**४०** महिन्याच्या प्रतिपदेस दर्शनमंडपाचा निवास-
मंडप उभा कर. ३ त्यामध्यें आज्ञापटाचा कोश
ठेव आणि तो अंतरपटानें झांक. ४ मेज आंत नेऊन
त्यावरलें सामान व्यवस्थेनें ठेव आणि दीपवृक्ष आंत
नेऊन त्याचे दिवे लाव. ५ आज्ञापटाच्या कोशापुढें
सोन्याची धूपवेदी ठेव आणि निवासमंडपाच्या दाराचा
पडदा लाव. ६ दर्शनमंडपाच्या निवासमंडपाच्या
दारापुढें होमवेदी ठेव. ७ दर्शनमंडप आणि वेदी
यांच्यामध्यें गंगाळ ठेवून त्यांत पाणी भर. ८ सभोवतीं
अंगण कर व त्याच्या दारास पडदा लाव. ९ अभि-
षेकाचें तेल घेऊन निवासमंडपास आणि त्यांतल्या सगळ्या
वस्तूंस अभ्यंग कर आणि तो मंडप व त्याचें सर्व
सामान हीं पवित्र कर, या प्रकारें तो पवित्र होईल.
१० होमवेदी व तिचें सर्व सामान यांस अभ्यंग करून
पवित्र कर, म्हणजे ती परम पवित्र होईल. ११ गंगाळ
व त्याची बैठक यांस अभ्यंग करून पवित्र कर,
१२ अहरोन आणि त्याचे पुत्र यांस दर्शनमंडपाच्या
दाराशीं नेऊन जलस्नान घाल. १३ अहरोनास पवित्र
वस्त्रें लेवीव व त्याला अभिषेक करून पवित्र कर,
म्हणजे तो याजकाच्या नात्यानें माझी सेवा करील.
१४ त्याच्या पुत्रांस आणून त्यांच्या अंगांत अंगरखे
घाल; १५ तूं त्यांच्या पित्यास जसा अभिषेक करिशील
तसाच त्यांस कर, म्हणजे ते याजकाच्या नात्यानें माझी
सेवा करितील; हा त्यांचा अभिषेक पिढ्यानपिढ्या
निरंतरच्या याजकपदाचा दर्शक होईल. १६ मोशानें
असें केलें; परमेश्वरानें आज्ञा दिल्याप्रमाणें त्यानें सर्व
कांहीं केलें.

१७ आणि दुसऱ्या वर्षांतील पहिल्या महिन्याच्या
प्रतिपदेस निवासमंडपाची उभारणी झाली. १८ मोशानें
निवासमंडप उभा केला; त्यानें त्याच्या खुरच्या बसवून
फळ्या लाविल्या, अडसर लाविले व त्याचे खांब उभे
केले; १९ आणि त्यानें निवासमंडपावरून तंबू
ताणिला व तंबूचें आच्छादन त्यावर घातलें; परमेश्वरानें
आज्ञा दिल्याप्रमाणें मोशानें हें केलें. २० त्यानें
आज्ञापट घेऊन कोशांत ठेविला व कोशाला दांडे लावून
त्यावर दयासन ठेविलें; २१ त्यानें तो कोश निवास-
मंडपांत नेला आणि अंतरपट लावून आज्ञापटाचा
कोश झांकिला; परमेश्वरानें मोशाला आज्ञा केल्याप्रमाणें
हें झालें. २२ त्यानें निवासमंडपाच्या उत्तर बाजूस दर्शन-
मंडपांत अंतरपटाच्या बाहेर मेज ठेविलें; २३ आणि त्यावर
परमेश्वरासमोर समर्पित केलेली भाकर मांडिली; परमे-
श्वरानें मोशाला आज्ञा केल्याप्रमाणें हें झालें. २४ त्यानें
निवासमंडपाच्या दक्षिण बाजूस दर्शनमंडपांत मेजासमोर
दीपवृक्ष ठेविला २५ आणि परमेश्वरासमोर दिवे लाविले;
परमेश्वरानें मोशाला आज्ञा केल्याप्रमाणें हें झालें. २६
त्यानें दर्शनमंडपांत अंतरपटासमोर सोन्याची वेदी
ठेविली; २७ तिच्यावर त्यानें सुगंधी द्रव्याचा धूप
जाळिला; परमेश्वरानें मोशाला आज्ञा केल्याप्रमाणें हें
झालें. २८ त्यानें निवासमंडपाच्या दाराला पडदा लाविला
२९ आणि दर्शनमंडपाच्या निवासमंडपाच्या दारापाशीं

होमवेदी ठेवून तिजवर होमबलि व अन्नबलि अर्पिले;
परमेश्वरानें मोशाला आज्ञा केल्याप्रमाणें हें झालें.
३० दर्शनमंडप आणि वेदी यांच्यामध्यें त्यानें गंगाळ
ठेवून धुण्यासाठीं त्यांत पाणी भरिलें. ३१ मोशे
आणि अहरोन व त्याचे पुत्र त्यांत आपआपले हात-
पाय धूत; ३२ ते दर्शनमंडपांत किंवा वेदीपाशीं
जात तेव्हां ते आपले हातपाय तेथें धूत; परमेश्वरानें
मोशाला आज्ञा केल्याप्रमाणें हें झालें. ३३ त्यानें
निवासमंडपासभोवतीं आणि वेदीच्या आसपास अंगणाची
कनात उभी केली आणि त्याच्या दाराचा पडदा
लाविला. या प्रकारें मोशानें सर्व काम संपविलें.

३४ मग दर्शनमंडपावर मेघानें छाया केली व
निवासमंडप परमेश्वराच्या तेजानें भरून गेला.
३५ दर्शनमंडपावर मेघ स्थिर झाला आणि परमेश्वराच्या
तेजानें निवासमंडप भरून गेला म्हणून मोशाला आंत
प्रवेश करितां येईना. ३६ इस्राएल लोकांच्या एकंदर
प्रवासांत निवासमंडपावरील मेघ वर जाई तेव्हां
ते कूच करीत; ३७ आणि तो मेघ तेथून वर न गेला
तर ते कूच करीत नसत; तो वर जाईपर्यंत ते
तेथेंच थांबत. ३८ परमेश्वराचा मेघ दिवसां निवासमंडपा-
वर राही आणि रात्रीं त्यांत अग्नि असे; हें असें एकंदर
प्रवासांत सर्व इस्राएल घराण्याच्या दृष्टीस पडत असे.

---

# लेवीय

—:०:—

१ परमेश्वरानें दर्शनमंडपांतून मोशाला हाक
**१** मारून म्हटलें, २ इस्राएल लोकांस असें सांग कीं
तुमच्यापैकीं कोणी मनुष्य परमेश्वराला पशुबलि
अर्पील तेव्हां त्यानें तो गुरेंढोरें व शेरडेंमेंढरें
यांतला अर्पावा.

३ गुरांढोरांतला होमबलि अर्पावयाचा असल्यास
त्यानें निर्दोष असा नर अर्पावा; तो त्यानें दर्शन-
मंडपाच्या दाराशीं अर्पावा, म्हणजे परमेश्वरासमोर तो
मान्य होईल. ४ यज्ञपशूच्या मस्तकावर त्यानें हात
ठेवावा म्हणजे तो पशु त्याच्या प्रायश्चित्तादाखल मान्य
होईल. ५ त्यानें त्या गोऱ्ह्याचा परमेश्वरासमोर वध
करावा, आणि अहरोनाचे पुत्र जे याजक त्यांनीं त्याचें
रक्त अर्पून दर्शनमंडपाच्या दाराशीं असलेल्या वेदीवर
सभोवतीं शिंपडावें. ६ मग त्या यज्ञपशूचें कातडें
काढून त्याचे तुकडे करावे. ७ नंतर अहरोन याज-
काच्या पुत्रांनीं वेदीवर विस्तव ठेवावा आणि त्यावर
लाकडें रचावीं; ८ आणि अहरोनाचे पुत्र जे याजक
त्यांनी वेदीवरच्या विस्तवावरील लाकडांवर तुकडे,
शीर व वपा हीं रचावीं; ९ त्याचीं आंतडीं आणि
पाय त्यानें पाण्यानें धुवावे; मग याजकानें त्या सगळ्याचा
वेदीवर होम करून तें अर्पावें; तें परमेश्वराप्रीत्यर्थ
सुवासिक हव्य होईल.

१० शेरडांमेंढरांपैकीं होमबलि अर्पावयाचा अस-
ल्यास तो निर्दोष नर असावा. ११ त्यानें त्याचा
परमेश्वरासमोर वेदीच्या उत्तर बाजूस वध करावा,
आणि अहरोनाचे पुत्र जे याजक त्यांनीं त्याचें रक्त
वेदीवर सभोवतीं शिंपडावें. १२ त्यानें त्याचे कापून
तुकडे करावे आणि त्याचें शीर व वपा हीं अलग
करावीं; आणि याजकानें हें सगळें वेदीवरच्या
विस्तवावरील लाकडांवर रचावें; १३ त्याचीं आंतडीं

व पाय हीं पाण्यानें धुवावीं आणि याजकानें त्या सग-
ळ्याचा वेदीवर होम करून तें अर्पावें; हा होमबलि
परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य होईल.
१४ परमेश्वराप्रीत्यर्थ त्याला पक्ष्याचा होमबलि
अर्पावयाचा असला तर होले किंवा पारव्यांचीं
पिलें त्यानें अर्पावीं. १५ याजकानें तो पक्षी वेदीजवळ
नेऊन त्याचें मुंडकें मुरगाळून काढावें आणि वेदीवर
त्याचा होम करावा आणि त्याचें रक्त वेदीच्या बाजूवर
निचरून टाकावें; १६ त्याचा चुनाळ व पिसें काढून
वेदीच्या पूर्वेस राख टाकण्याच्या ठिकाणीं फेकून द्यावीं;
१७ त्यानें तो पंखांच्या मधोमध फाडावा, पण ते भाग
अलग करूं नयेत; मग याजकानें वेदीवरल्या विस्तवा-
वरील लाकडांवर त्याचा होम करावा; हा होमबलि
परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य होय.

१ कोणाला परमेश्वरास अन्नार्पण करावयाचें
२ असल्यास त्यानें सपीठ अर्पावें; त्यावर त्यानें तेल
ओतावें आणि वरतीं धूप ठेवावा; २ मग त्यानें तें
अहरोनाचे पुत्र जे याजक त्यांच्याकडे आणावें; त्यांतून
मूठभर सपीठ, तेल व सगळा धूप घेऊन याजकानें
स्मारकभाग म्हणून त्याचा वेदीवर होम करावा,
म्हणजे तें परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य होईल;
३ अन्नार्पणांतला जो कांहीं शेष राहील तो अहरोनाचा
व त्याच्या पुत्रांचा; हा शेष परमेश्वराला अर्पावयाचीं
जीं हव्यें त्यांतला परम पवित्र होय.
४ भट्टींत भाजलेलें अन्नार्पण करावयाचें असल्यास
तें तेलांत मळलेल्या सपिठाच्या बेखमीर भाकरी
अथवा तेल चोपडलेल्या बेखमीर पापड्या यांचें
असावें. ५ तव्यावर भाजलेलें अन्नार्पण करावयाचें
असल्यास तें तेलानें मळलेल्या बेखमीर सपि-
ठाचें असावें. ६ त्याचे तुकडे करून त्यांवर तेल
ओतावें; हें अन्नार्पण होय. ७ कढईत तळलेलें अन्ना-
र्पण करावयाचें असल्यास तेंहि तेलांत मळलेल्या
सपिठाचें असावें. ८ अशा प्रकारचें अन्नार्पण तूं
आणिशील तें परमेश्वरासमोर न्यावें; तें याजकाकडे
आणून द्यावें; व त्यानें तें वेदीपाशीं न्यावें. ९ याजकानें
अन्नार्पणापैकीं स्मारकभाग काढून त्याचा वेदीवर होम
करावा, म्हणजे तो परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य
होईल. १० अन्नार्पणापैकीं जो कांहीं शेष राहील
तो अहरोनाचा व त्याच्या पुत्रांचा; हा शेष परमेश्वराला
अर्पावयाचीं जीं हव्यें त्यांतला परम पवित्र होय.
११ परमेश्वरास अर्पिलेल्या कोणत्याहि अन्नार्पणांत
खमीर नसावें; खमीर किंवा मध ह्याचा अग्नींत होम
करून तो परमेश्वराला अर्पूं नये. १२ प्रथमफळ म्हणून
त्यांचें अर्पण परमेश्वराला करावें; पण तीं सुवासिक हव्य
म्हणून वेदीवर अर्पूं नयेत. १३ तूं करिशील तें सर्व अन्ना-
र्पण मिठानें रुचकर कर; तूं आपल्या देवाशीं केलेल्या
कराराचें मीठ आपल्या अन्नार्पणांत घालावयास चुकूं नको;
तुझ्या सर्व अर्पणांत मीठ असावें.
१४ परमेश्वराप्रीत्यर्थ तूं अन्नार्पण म्हणून प्रथम
उपज अर्पिशील तर विस्तवावर भाजलेल्या हिरव्या
कणसांतला दाणा, म्हणजे हिरव्या कणसाच्या चोळून
काढलेल्या ओंब्या प्रथम उपजाचें अन्नार्पण म्हणून
आण. १५ त्यावर तेल ओत व धूप ठेव; हें अन्नार्पण
होय. १६ चोळून काढिलेले दाणे व तेल यांपैकीं कांहीं
व सर्व धूप स्मारकभाग म्हणून याजकानें जाळावा; हा
परमेश्वराप्रीत्यर्थ हव्य होय.

१ कोणाला शांत्यर्पणाचा यज्ञ करावयाचा असेल
३ व तो गुरांढोरांचा करावयाचा असेल तर यज्ञपशु नर
असो किंवा मादी असो, तो निर्दोष पाहून परमे-
श्वराप्रीत्यर्थ अर्पावा. २ त्यानें आपल्या बलीच्या
डोक्यावर हात ठेवावा व तो दर्शनमंडपाच्या दारीं
वधावा; आणि अहरोनाचे पुत्र जे याजक त्यांनीं त्याचें
रक्त वेदीवर सभोवतीं शिंपडावें. ३ शांत्यर्पणाच्या
यज्ञपशूच्या ज्या भागाचा परमेश्वराप्रीत्यर्थ होम करावा तो
हा : आंतड्यांवर पसरलेली वपा व त्यांस लागून असलेली
सर्व वपा, ४ दोन्ही गुर्दे, त्यांवरली कमरेजवळची वपा
व गुर्द्यांपर्यंतचा काळजावरला पडदा हीं त्यानें वेगळीं
करावीं. ५ हें सर्व घेऊन अहरोनाच्या पुत्रांनीं वेदीवर,
विस्तवावर ठेवलेल्या लाकडांवरील होमबलीवर त्याचा
होम करावा; हें परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य होय.

६ परमेश्वराप्रीत्यर्थ शांत्यर्पणाच्या यज्ञासाठीं शेरडां-
मेंढरांपैकीं त्याला बलि आणावयाचा असल्यास, तो नर
असो किंवा मादी असो, त्यानें तो निर्दोष पाहून
आणावा. ७ कोकराचा बलि त्यास अर्पावयाचा अस-
ल्यास तो त्यानें परमेश्वरासमोर अर्पावा; ८ त्यानें त्या
बलीच्या डोक्यावर आपला हात ठेवावा व तो दर्शन-
मंडपासमोर वधावा, आणि अहरोनाच्या पुत्रांनीं त्याचें
रक्त वेदीवर सभोवतीं शिंपडावें. ९ शांत्यर्पणाच्या
यज्ञपशूच्या ज्या भागाचा परमेश्वराप्रीत्यर्थ होम करावा
तो हा: त्याची वपा व पाठीच्या कण्यांतून कापून
काढलेलें चरबीदार शेपूट, आंतड्यांवर पसरलेली
वपा व त्यांस लागून असलेली सर्व वपा, १० दोन्ही
गुर्दे, त्यांवरली कमरेजवळची वपा व गुर्द्यांपर्यंतचा
काळजावरला पडदा हीं वेगळीं काढून घ्यावीं; ११ त्यांचा
याजकानें वेदीवर होम करावा; हें परमेश्वराप्रीत्यर्थ
हव्यान्न होय.

१२ बकऱ्याचा बलि असल्यास त्यानें तो परमेश्वरा-
समोर अर्पावा; १३ त्यानें त्याच्या डोक्यावर आपला
हात ठेवावा व दर्शनमंडपासमोर तो वधावा; आणि
अहरोनाच्या पुत्रांनीं त्याचें रक्त वेदीवर सभोवतीं
शिंपडावें. १४ ह्या बलीचा जो भाग परमेश्वराला हव्य
म्हणून अर्पावयाचा तो हा: आंतड्यांवर पसरलेली
वपा, त्यांस लागून असलेली सर्व वपा, १५ दोन्ही
गुर्दे, त्यांवरली कमरेजवळची वपा, आणि गुर्द्यां-
पर्यंतचा काळजावरील पडदा हीं वेगळीं काढून घ्यावीं;
१६ त्यांचा याजकानें वेदीवर होम करावा. हें सुवासिक
हव्यान्न होय; कारण वपा म्हणून जेवढी असेल तेवढी
परमेश्वराची. १७ तुम्हीं वपा व रक्त सेवन करूं नये,
हा तुम्हांस व तुमच्या सर्व घराण्यांस पिढ्यानपिढ्या
निरंतरचा निर्बंध होय.

४ १ मग परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्राएल
लोकांस असें सांग: परमेश्वरानें निषेधिलेल्या
कृत्यांपैकीं एखादें कृत्य चुकून केल्यानें कोणाकडून
पाप घडलें; ३ अथवा लोकांस पातक लागेल अशा
प्रकारचें कांहीं पाप अभिषिक्त याजकानें केलें तर त्यानें
आपल्या पातकास्तव पापार्पण म्हणून एक निर्दोष गोऱ्हा
परमेश्वराला अर्पावा. ४ तो गोऱ्हा परमेश्वरासमोर
दर्शनमंडपाच्या दारीं त्यानें आणावा व त्याच्या
डोक्यावर आपला हात ठेवून परमेश्वरासमोर तो वधावा.
५ अभिषिक्त याजकानें गोऱ्ह्याचें कांहीं रक्त घेऊन दर्शन-
मंडपांत न्यावें; ६ याजकानें आपलें बोट त्या रक्तांत
बुडवून परमेश्वरासमोर, पवित्रस्थानाच्या अंतरपटा-
समोर, तें सात वेळां शिंपडावें. ७ आणि याजकानें
त्यांतलें कांहीं रक्त घेऊन दर्शनमंडपांत परमेश्वरासमोर
असलेल्या धूपवेदीच्या शृंगांस लावावें; मग त्या
गोऱ्ह्याचें बाकीचें सगळें रक्त दर्शनमंडपाच्या दारीं
असलेल्या होमवेदीच्या पायथ्यावर ओतावें. ८ नंतर
पापबलीच्या गोऱ्ह्याची सर्व वपा काढावी, म्हणजे
आंतड्यांवर पसरलेली वपा, त्यांस लागून असलेली
सर्व वपा, ९ दोन्ही गुर्दे, त्यांवरली कमरेजवळची
वपा आणि गुर्द्यांपर्यंतचा काळजावरला पडदा हीं
वेगळीं काढून घ्यावीं; १० हे सर्व भाग शांत्यर्पणाच्या
यज्ञांत बैलाचे काढून घेतात त्याप्रमाणें वेगळे काढून
घ्यावे व याजकानें ते होमवेदीवर अर्पावे. ११ गोऱ्ह्याचें
कातडें, मांस, डोकें, पाय, आंतडीं, शेण १२ असा
सगळा गोऱ्हा त्यानें छावणीच्या बाहेर राख टाकावयाच्या
शुद्धस्थानीं न्यावा आणि लाकडांवर ठेवून अग्नीनें
जाळावा; राख टाकीत असतात तेथें तो जाळावा.

१३ इस्राएलाच्या सर्व मंडळीनें चुकून कांहीं पाप
केलें व तें एकंदर मंडळीला कळलें नाहीं, आणि परमे-
श्वरानें निषेधिलेलें एकादें कृत्य करून ते दोषी झाले;
१४ आणि मग त्यांनीं केलेलें पाप उघडकीस आलें,
तर सर्व मंडळीनें गोऱ्ह्याचा पापबलि अर्पावा आणि
तो दर्शनमंडपासमोर आणावा. १५ मंडळीच्या वडील
लोकांनीं परमेश्वरासमोर त्या गोऱ्ह्याच्या डोक्यावर
आपले हात ठेवावे आणि तो परमेश्वरासमोर वधावा.
१६ अभिषिक्त याजकानें त्या गोऱ्ह्याचें कांहीं रक्त
घेऊन दर्शनमंडपांत आणावें. १७ याजकानें त्या रक्तांत
आपलें बोट बुडवून परमेश्वरासमोर म्हणजे अंतरपटा-
पुढें तें सात वेळां शिंपडावें. १८ मग दर्शनमंडपांतली

परमेश्वरासमोरची जी वेदी तिच्या शृंगांस कांहीं रक्त
लावावें आणि बाकीचें सर्व रक्त घेऊन दर्शनमंडपाच्या
दाराशीं असलेल्या होमवेदीच्या पायथ्यावर ओतावें.
१९ त्या गोऱ्ह्याची सर्व वपा काढून तिचा वेदीवर होम
करावा. २० पापार्पणाच्या गोऱ्ह्याचें जसें करावयाचें तसेंच
याचेंहि करावें; या प्रकारें याजकानें इस्राएल लोकांप्रीत्यर्थ
प्रायश्चित्त करावें म्हणजे त्यांना क्षमा होईल. २१ पूर्वोक्त
गोऱ्हा जाळावयाचा तसाच हाहि गोऱ्हा छावणीच्या
बाहेर नेऊन जाळावा; हें मंडळीप्रीत्यर्थ पापार्पण होय.

२२ आपला देव परमेश्वर यानें निषेधिलेलें
कोणतेंहि कृत्य चुकून झाल्यानें पाप घडून कोणी
अधिपति दोषी झाला, २३ आणि त्यानें केलेलें पाप
त्यास कळून आलें, तर त्यानें एक निर्दोष बकरा
बलि देण्यासाठीं आणावा; २४ त्यानें त्या बकऱ्याच्या
डोक्यावर हात ठेवावा आणि परमेश्वरासमोर जेथें
यज्ञपशु वधितात तेथें तो वधावा; हें पापार्पण होय.
२५ मग याजकानें आपल्या बोटानें त्या पापबलीचें कांहीं
रक्त घेऊन होमवेदीच्या शृंगांस लावावें आणि बाकी
सर्व रक्त होमवेदीच्या पायथ्यावर ओतावें. २६ शांत्यर्प-
णाच्या यज्ञपशूंच्या वपेप्रमाणें याच्याहि सर्व वपेचा त्यानें
वेदीवर होम करावा; या प्रकारें त्याच्या पापाबद्दल
याजकानें प्रायश्चित्त करावें म्हणजे त्याला क्षमा
होईल.

२७ साधारण लोकांपैकीं कोणीं चुकून पाप केलें
म्हणजे अर्थात् परमेश्वरानें निषेधिलेलें एकादें कृत्य
चुकून केल्यानें पाप घडून तो दोषी झाला, २८ आणि
त्यानें केलेलें पाप त्याला कळून आलें, तर त्यानें त्या
पापाबद्दल अर्पिण्यासाठीं एक निर्दोष बकरी आणावी.
२९ त्यानें ह्या पापबलीच्या डोक्यावर हात ठेवावा आणि
होमबलि वधितात त्या ठिकाणीं तो वधावा. ३० मग
याजकानें त्याचें कांहीं रक्त बोटानें घेऊन होमवेदीच्या
शृंगांस लावावें आणि बाकीचें सर्व रक्त वेदीच्या
पायथ्यावर ओतावें; ३१ आणि शांत्यर्पणाच्या यज्ञ-
पशूच्या वपेप्रमाणें याचीहि सर्व वपा वेगळी काढून
घ्यावी व याजकानें ती परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य
व्हावी म्हणून तिचा वेदीवर होम करावा; याजकानें
त्याच्यासाठीं प्रायश्चित्त करावें म्हणजे त्याला क्षमा
होईल.

३२ त्यानें पापार्पणासाठीं कोकरूं आणिलें तर तें
निर्दोष असून ती मादी असावी. ३३ त्यानें पाप-
बलीच्या डोक्यावर आपला हात ठेवावा, व जेथें होम-
बलि वधितात तेथें तो पापार्पणासाठीं वधावा.
३४ याजकानें आपल्या बोटानें पापबलीचें कांहीं रक्त
घेऊन होमवेदीच्या शृंगांस लावावें आणि बाकीचें रक्त
वेदीच्या पायथ्यावर ओतावें; ३५ आणि शांत्यर्पणाच्या
कोकराच्या वपेप्रमाणें त्याची सर्व वपा वेगळी काढून
घ्यावी आणि परमेश्वराप्रीत्यर्थ वेदीवर असलेल्या हव्यांवर
तिचा होम करावा; याप्रमाणें त्यानें केलेल्या पापाबद्दल
याजकानें प्रायश्चित्त करावें म्हणजे त्याला क्षमा होईल.

१ तूं कांहीं पाहिलें किंवा ऐकलें काय, असें
५ कोणास साक्षीदार या नात्यानें प्रतिज्ञेवर विचारिलें
असतां तो कांहीं सांगत नाहीं, हें पातक त्याच्याकडून
घडलें तर त्याच्या दुष्कर्माचें त्याला फळ मिळेल; २ कोणी
अशुद्ध वस्तूला नकळत शिवून अशुद्ध झाला तर तो
दोषी होईल, मग तें अशुद्ध वनपशूचें अगर अशुद्ध ग्राम-
पशूचें शव असो, अथवा रांगणाऱ्या अशुद्ध प्राण्याचें शव
असो : ३ त्याप्रमाणेंच कोणी मनुष्य कांहीं अशुद्ध वस्तूला
नकळत शिवला असून तें त्याला कळून आलें म्हणजे तो
दोषी समजावा, मग ती अशुद्ध करणारी वस्तु कोणत्याहि
प्रकारची का असेना. ४ कोणा मनुष्यानें एकादी बरीवाईट
गोष्ट करण्याविषयीं अविचारानें प्रतिज्ञा केली, मग ती अवि-
चारानें प्रतिज्ञा केलेली गोष्ट कोणतीहि असो, व ती त्यानें
अज्ञानानें केली, आणि ती त्याला कळून आली तर अशा
प्रत्येक गोष्टीसंबंधानें तो दोषी समजावा; ५ तो अशा
कोणत्याहि गोष्टीविषयीं दोषी झाला तर ज्या बाबतींत त्यानें
पाप केलें ती त्यानें कबूल करावी; ६ त्यानें केलेल्या
पापाबद्दल परमेश्वराप्रीत्यर्थ दोषार्पण आणावें; त्यानें
कळपांतली एक मादी म्हणजे कोकरूं किंवा करडूं
पापार्पण करण्यासाठीं आणावें; आणि याजकानें त्याच्या
पापासंबंधानें त्याच्यासाठीं प्रायश्चित्त करावें.

७ कोंकरूं देण्याचें सामर्थ्य त्याला नसलें तर त्यानें आपल्या
पापाबद्दल दोन होले अथवा पारव्याचीं दोन पिलें दोषा-
र्पणासाठीं परमेश्वरापाशीं आणावीं; त्यांपैकीं एक पापार्पण व
दुसरें होमार्पण करावें. ८ त्यानें तीं याजकापाशीं
आणावीं; मग याजकानें पापबलि पहिल्यानें अर्पावा;
त्याची मुंडी त्यानें मुरगाळून मोडावी पण अलग करूं
नये; ९ पापबलीचें कांहीं रक्त वेदीच्या बाजूवर शिंप-
डावें व बाकीचें रक्त वेदीच्या पायथ्यावर निचरूं द्यावें;
हें पापार्पण होय. १० दुसऱ्या पक्ष्याचा त्यानें विधिपूर्वक
होम करावा; त्यानें केलेल्या पापासंबंधानें त्याच्यासाठीं
याजकानें प्रायश्चित्त करावें, म्हणजे त्याला क्षमा होईल.

११ दोन होले अथवा पारव्याचीं दोन पिलें देखील
देण्याची शक्ति त्याला नसेल तर त्यानें आपल्या पापा-
बद्दल एक दशमांश एफा सपीठ पापार्पण म्हणून
आणावें; त्यावर त्यानें तेल घालूं नये किंवा धूप ठेवूं
नये, कारण हें पापार्पण होय. १२ त्यानें तें याजकाकडे
आणावें आणि याजकानें त्यांतलें मूठभर घेऊन स्मारक-
भाग म्हणून वेदीवरील परमेश्वराप्रीत्यर्थ केलेल्या हव्यां-
वर त्याचा होम करावा; हें पापार्पण होय. १३ सदरील
कोणत्याहि गोष्टीसंबंधानें कोणी पाप करील तर याजकानें
त्याच्यासाठीं प्रायश्चित्त करावें म्हणजे त्याला क्षमा होईल;
अन्नार्पणाप्रमाणें पापार्पणाचा शेष याजकाचा समजावा.

१४ परमेश्वर मोशाला म्हणाला: १५ कोणी
परमेश्वराच्या पवित्र केलेल्या एकाद्या वस्तूसंबंधानें
चुकून अतिक्रमण करून पापी ठरला तर त्यानें परमे-
श्वरास दोषार्पण करण्यासाठीं कळपांतला एक निर्दोष
मेंढा घेऊन यावें; तूं ठरविशील तितक्या चांदीच्या
शेकेलांचा तो असावा, हे शेकेल पवित्रस्थानांतल्या
चलनाप्रमाणें असावे; हें दोषार्पण होय. १६ ज्या पवित्र
वस्तूच्यासंबंधानें त्यानें पाप केलें असेल तिची भरपाई
करावी, आणि तींत तिच्या मोलाचा आणखी पांचवा
हिस्सा घालून ती याजकास द्यावी; याजकानें हा
दोषार्पणाचा मेंढा अर्पून त्याच्यासाठीं प्रायश्चित्त करावें
म्हणजे त्याला क्षमा होईल.

१७ परमेश्वरानें निषेधिलेलें कांहीं कृत्य केल्याचें
पातक कोणाकडून घडलें, मग तें त्याला नकळत का घडेना,
तर तो दोषी ठरेल व त्याच्या दुष्कर्माचें त्याला फळ मिळेल.
१८ त्यानें कळपांतला एक निर्दोष मेंढा दोषार्पणासाठीं
याजकापाशीं आणावा; तूं ठरविशील तेवढ्या किंमतीचा
तो असावा; त्यानें अज्ञानानें जी चूक केली असेल
तीबद्दल याजकानें प्रायश्चित्त करावें, म्हणजे त्याला क्षमा
होईल. १९ हें दोषार्पण होय; परमेश्वरासमोर तो
मनुष्य निःसंशय दोषी आहे.

६ १ परमेश्वर मोशाला म्हणाला: २ कोणी पाप
करून परमेश्वराचा अपराधी झाला, म्हणजे ठेव,
गहाण किंवा लूट यांसंबंधानें आपल्या शेजाऱ्याशीं
त्यानें दगा केला किंवा त्याजवर जुलूम केला, ३ किंवा
कोणाची हरवलेली वस्तु हातीं लागली असतां तिच्या-
संबंधानें त्यानें लबाडी करून खोटी शपथ वाहिली
अशा ज्या गोष्टी करून लोक पापांत पडतात, त्यांपैकीं
कांहीं करून कोणी अपराधी झाला, ४ म्हणजे असलें
पाप करून दोषी झाला तर त्यानें लूट करून, किंवा जुलूम
करून कांहीं घेतलें असेल तें, किंवा आपल्याजवळची
कोणाची ठेव बुडविली असेल ती, किंवा कोणाची
हरवलेली वस्तु त्याला सांपडली असून त्यानें दिली
नसेल ती, ५ किंवा ज्या एकाद्या वस्तूसंबंधानें त्यानें
खोटी शपथ वाहिली असेल ती, पुरी भरून द्यावी; ज्या
दिवशीं तो दोषी ठरविण्यांत येईल त्याच दिवशीं
ज्याचा त्यानें अपहार केला असेल त्याची पुरी
भरपाई करून देऊन वर आणखी एक पंचमांश
द्यावा. ६ त्यानें परमेश्वराप्रीत्यर्थ आपलें दोषार्पणहि
आणावें; तूं ठरविशील तेवढ्या किंमतीचा कळपांतला
एक निर्दोष मेंढा दोषार्पणासाठीं याजकाकडे
न्यावा; ७ याजकानें तो घेऊन परमेश्वरासमोर
त्याच्यासाठीं प्रायश्चित्त करावें, म्हणजे जें कांहीं
कृत्य करून तो दोषी झाला असेल त्याची त्याला
क्षमा होईल.

८ परमेश्वर मोशाला म्हणाला: ९ अहरोन व त्याचे
पुत्र यांस आज्ञा कर कीं होमबलीचा विधि असा करा:
होमबलि वेदीवरील इंधनावर रात्रभर ठेवून तो सकाळ-

पर्यंत असूं द्यावा, आणि वेदीवरील अग्नि जळत ठेवावा.
१० मग याजकानें आपला सणाचा झगा घालून व
सणाच्या चोळण्यानें आपलें शरीर झाकून होमबलि
अग्नीनें भस्म झाल्यावर त्याची जी राख वेदीवर राहील
ती काढून वेदीजवळ ठेवावी. ११ मग त्यानें आपलीं
वस्त्रें उतरून दुसरीं वस्त्रें घालावीं आणि ती राख
छावणीबाहेर एकाद्या शुद्ध स्थळीं घेऊन जावें.
१२ वेदीवरला अग्नि वेदीवरच जळत ठेवावा, तो
विझूं देतां कामा नये; याजकानें त्यावर नित्य सकाळीं
इंधनें घालून तो पेटता ठेवावा आणि त्यावर होमबलि
रचून त्यावर शांत्यर्पणाच्या वपेचा होम करावा. १३ वेदी-
वर अग्नि सतत जळत ठेवावा, तो विझूं देतां कामा नये.
१४ अन्नार्पणाचा विधि असा: अहरोनाच्या पुत्रांनीं
परमेश्वरासमोर वेदीपाशीं तें अन्न अर्पावें; १५ त्या
अन्नार्पणापैकीं मूठभर सपीठ, कांहीं तेल व त्यावरला
सगळा धूप घेऊन तो अन्नार्पणाच्या स्मारकभागाचा परमे-
श्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य व्हावा म्हणून त्याचा वेदीवर
होम करावा. १६ त्यांतून शेष राहील तें अहरोनानें व
त्याच्या पुत्रांनीं खावें, तें त्यांनीं पवित्र स्थळीं
दर्शनमंडपाच्या अंगणांत खमिरावांचून खावें. १७ तें
भाजतांना त्यांत खमीर घालूं नये; तें मीं आपल्या
हव्यांतून त्यांचा भाग म्हणून त्यांस दिलें आहे; पापा-
र्पण अथवा दोषार्पण जसें परम पवित्र आहे तसेंच
हेंहि आहे; १८ अहरोनाच्या संततीपैकीं सर्व पुरुषांस
तें खाण्याचा हक्क आहे; परमेश्वराच्या हव्यांपैकीं हा
त्यांचा हक्क पिढ्यानपिढ्या निरंतर चालू राहावा, या
हव्यांस जो कोणी स्पर्श करील तो पवित्र होईल.
१९ परमेश्वर मोशाला म्हणाला, २० अहरोनाला
अभिषेक होईल त्या दिवशीं त्यानें आपल्या पुत्रांसह
परमेश्वरास जें अर्पण करावयाचें तें हें: एक दशमांश
एफा सपीठ नित्याचें अन्नार्पण म्हणून द्यावें व त्यापैकीं
अर्धे सकाळीं व अर्धे संध्याकाळीं अर्पावें. २१ तें तव्यावर
तेलांत परतावें, त्यांत तेल चांगलें मुरल्यावर तें घेऊन
यावें व त्या भाजलेल्या अन्नार्पणाचे भाग करून ते पर-
मेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य म्हणून अर्पावे. २२ त्याच्या
पुत्रांपैकीं जो त्याच्या पदीं अभिषिक्त होईल त्यानेंहि
असेंच अर्पण करावें; निरंतरच्या विधीप्रमाणें परमेश्वरा-
प्रीत्यर्थ त्याचा निःशेष होम करावा. २३ याजकांच्या
सर्व अन्नार्पणांचा निःशेष होम करावा, तीं खाऊं नयेत.
२४ परमेश्वर मोशाला म्हणाला: २५ अहरोन व
त्याचे पुत्र यांस सांग कीं पापार्पणाचा विधि असा;
ज्या स्थानीं होमपशु वधितात तेथेंच परमेश्वरासमोर
पापबलिहि वधावा; तो परम पवित्र होय. २६ जो
याजक पापबलि अर्पील त्यानें तो भक्षण करावा;
दर्शनमंडपाच्या अंगणांत पवित्र स्थळीं तो खावा.
२७ त्याच्या मांसाचा स्पर्श ज्यास होईल तो पवित्र;
आणि त्याच्या रक्ताचे कांहीं थेंब वस्त्रावर उडाले तर तें
थेंब उडालेलें वस्त्र एकाद्या पवित्र स्थळीं धुवावें.
२८ तो पापबलि मडक्यांत शिजविला असल्यास तें
मडकें फोडून टाकावें; पण पितळेच्या पात्रांत तो
शिजविला तर तें पात्र घासून पाण्यानें धुवावें. २९ तो
बलि खाण्याचा हक्क याजकवर्गांतील सर्व पुरुषांस आहे;
तो परम पवित्र होय; ३० पण ज्या पापबलीचें
कांहीं रक्त दर्शनमंडपांत पवित्रस्थानीं प्रायश्चित्तासाठीं
आणितील त्याचें मांस खाऊं नये, तो अग्नींत जाळावा.
१ दोषार्पणाचा विधि असा: हें अर्पण परम
७ पवित्र होय. २ ज्या स्थानीं होमबलि वधावयाचा
त्या स्थानींच दोषार्पणाचा बलि वधावा आणि त्याचें रक्त
याजकानें वेदीवर सभोवतीं शिंपडावें. ३ त्याची सर्व वपा
त्यानें अर्पावी; त्याचें चरबीदार शेपूट, आंतड्यावर पसर-
लेली वपा, ४ दोन्ही गुर्दे, त्यांवरील कमरेजवळची
वपा व गुर्द्यांपर्यंतचा काळजावरचा पडदा हीं वेगळीं
काढून घ्यावीं; ५ त्यांचा याजकानें वेदीवर परमेश्वरा-
प्रीत्यर्थ हव्य म्हणून होम करावा; हें दोषार्पण होय. ६ हा
बलि खाण्याचा हक्क याजकवर्गांतल्या सर्व पुरुषांस आहे;
तो पवित्र स्थळीं खावा; तो परम पवित्र होय.
७ पापार्पणासारखाच दोषार्पणाचा विधि होय; दोहोंचा
विधि एकच; जो याजक त्याच्या द्वारें प्रायश्चित्त
करील त्याचा त्यावर हक्क आहे. ८ जो याजक
एकाद्या माणसासाठीं होमबलि अर्पील त्याचा हक्क त्या

होमबलीच्या कातव्यावर आहे. ९ भट्टीत, कढईत
किंवा तव्यावर भाजलीं जाणारीं सर्व अन्नार्पणें यज्ञ करणाऱ्या
याजकाचीं होत. १० प्रत्येक अन्नबलि, मग तो तेलानें
मिश्रित असो अथवा कोरडा असो, तो अहरोनाच्या सर्व
वंशजांचा होय; त्या सर्वांचा त्यावर समान हक्क आहे.
११ परमेश्वराप्रीत्यर्थ कोणास शांत्यर्पण करावयाचें
असल्यास त्याचा विधि हा: १२ त्याला तें उपकार-
स्मरणास्तव करावयाचें असेल तर तेलांत मळलेल्या
बेखमीर भाकरी, तेल लावलेल्या बेखमीर पापड्या
आणि तेलांत मळलेल्या सपिठाच्या तळलेल्या पुऱ्या
उपकारस्तुतीच्या अर्पणासह अर्पाव्या; १३ आणि
त्या उपकारस्मरणाच्या शांत्यर्पणासह खमीर घातलेल्या
भाकरीहि अर्पाव्या. १४ त्या प्रत्येक अर्पणांतून त्यानें
एक एक भाकर परमेश्वराप्रीत्यर्थ समर्पित केलेला अंश
म्हणून अर्पावी; शांत्यर्पणाचें रक्त शिंपडणाऱ्या याजकाचा
तिच्यावर हक्क आहे.
१५ उपकारस्मरणास्तव केलेल्या शांत्यर्पणाच्या यज्ञ-
बलीचें मांस अर्पावयाच्या दिवशींच खावें; सकाळपर्यंत
त्यांतलें कांहीं राहूं देऊं नये; १६ पण यज्ञबलीचें अर्पण
नवसाचें अथवा स्वसंतोषाचें असलें तर ज्या दिवशीं तें
तो अर्पील त्या दिवशीं तें खावें; आणि जें कांहीं त्यांतलें
राहील तें दुसऱ्या दिवशींहि खावें; १७ त्या यज्ञबलीचें
कांहीं मांस तिसरे दिवशीं राहिलें तर तें अग्नींत जाळावें.
१८ त्याच्या शांत्यर्पणाच्या यज्ञबलीच्या मांसापैकीं कांहीं
तिसरे दिवशीं खाण्यांत आलें तर तें मान्य होणार नाहीं;
तें अर्पण करणाऱ्याच्या हिशोबीं गणिलें जावयाचें नाहीं.
तें अमंगळ ठरेल; आणि जो कोणी तें खाईल त्याला
त्याच्या त्या दुष्कर्माचें फळ मिळेल.
१९ ज्या मांसाला एखाद्या अशुद्ध वस्तूचा स्पर्श होईल
तें खाऊं नये, तर तें अग्नींत जाळून टाकावें. जो कोणी
शुद्ध असेल त्यानेंच यज्ञबलीचें मांस खावें; २० पण एखा-
द्याच्या ठायीं अशुद्धता असून तो परमेश्वराप्रीत्यर्थ केलेल्या
शांत्यर्पणाच्या यज्ञबलीचें मांस खाईल तर त्याचा स्वजनांतून
उच्छेद व्हावा. २१ कोणा मनुष्याचा एखाद्या अशुद्ध वस्तूला
स्पर्श झाला, मग ती अशुद्धता मनुष्याची असो, पशूची
असो किंवा दुसऱ्या कोणत्या अमंगळ पदार्थाची असो,
त्यानें परमेश्वराप्रीत्यर्थ केलेल्या शांत्यर्पणाच्या यज्ञबलीचें
मांस खाल्लें तर त्याचा स्वजनांतून उच्छेद व्हावा.
२२ परमेश्वर मोशाला म्हणाला, २३ इस्राएल लोकांस
असें सांग: तुम्हीं बैलाची, मेंढराची अथवा बकऱ्याची
वपा खाऊं नये. २४ आपोआप मेलेल्या जनावराची
किंवा इतर पशूंनीं फाडून टाकिलेल्या जनावराची वपा
इतर कांहीं कामाला पाहिजे तर लावावी, पण ती
मुळींच खाऊं नये. २५ परमेश्वराप्रीत्यर्थ हव्य म्हणून
जो यज्ञबलि अग्नींत होम करून अर्पितात त्याची वपा
कोणी खाईल तर त्याचा स्वजनांतून उच्छेद व्हावा.
२६ तुम्हीं आपआपल्या घरीं पक्ष्याचें, जनावराचें वगैरे
कसलेंहि रक्त सेवन करूं नये. २७ जो कोणी रक्त
सेवन करील त्याचा स्वजनांतून उच्छेद व्हावा.
२८ परमेश्वर मोशाला म्हणाला, २९ इस्राएल
लोकांस सांग: जो कोणी परमेश्वराप्रीत्यर्थ शांत्यर्पणाचा
यज्ञबलि अर्पील त्यानें त्या शांत्यर्पणाचा कांहीं भाग
परमेश्वरासमोर आणावा; ३० त्यानें आपल्या हातानें
परमेश्वराप्रीत्यर्थ हव्य आणावें; यज्ञबलीचा ऊर परमे-
श्वराप्रीत्यर्थ ओवाळण्यासाठीं वपेसहित आणावा.
३१ याजकानें त्या वपेचा वेदीवर होम करावा; पण बलीचा
ऊर अहरोन व त्याचे वंशज यांचा. ३२ तुम्हीं आपल्या
शांत्यर्पणाच्या यज्ञबलीचा उजवा फरा समर्पित असलेला
अंश म्हणून याजकाकडे द्यावा. ३३ अहरोनाच्या वंशजां-
पैकीं जो कोणी शांत्यर्पणाच्या यज्ञबलीचें रक्त अथवा
वपा अर्पील त्याचा हक्क त्या उजव्या फऱ्यावर असावा.
३४ कारण इस्राएल लोकांच्या शांत्यर्पणांपैकीं ओवाळ-
णीचा ऊर आणि समर्पणाचा फरा हे मी अहरोन
याजक व त्याचे वंशज यांस देत आहें; हे दोन्ही इस्रा-
एल लोकांकडून मिळणारे त्यांचे निरंतरचे हक्क होत.
३५ याजक या नात्यानें परमेश्वराची सेवा करण्या-
साठीं अहरोन व त्याचे वंशज सादर करण्यांत आले
त्या दिवशीं, परमेश्वराप्रीत्यर्थ आणावयाच्या हव्यांपैकीं
हा त्याचा व त्याच्या पुत्रांचा अभिषेकभाग ठरला
आहे; ३६ ज्या दिवशीं परमेश्वरानें त्यांना अभिषेक

केला त्या दिवशीं त्यानें त्यांस इस्राएल लोकांकडून हा
भाग मिळावा अशी आज्ञा केली म्हणून पिढ्यानपिढ्या
त्यांचा हा निरंतरचा हक्क ठरला आहे.
३७ होमबलि, अन्नबलि, पापबलि, दोषबलि, याजकाच्या
समर्पणसमयींचा बलि आणि शांत्यर्पणाचा बलि यांचा विधि
हा; ३८ सीनाय रानांत इस्राएल लोकांनीं परमेश्वरास
काय काय अर्पणें करावीं यांविषयीं त्यांस आज्ञा दिली
त्या समयीं त्यानें मोशाला याप्रमाणें सीनाय डोंगरावर
हा विधि लावून दिला.

१ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ तूं अहरोन व
८ त्याजबरोबर त्याचे पुत्र यांस आणि त्यांचीं वस्त्रें,
अभिषेकाचें तेल, पापबलीसाठीं गोऱ्हा, दोन एडके
आणि बेखमीर भाकरींची टोपली हीं घेऊन ३ दर्शन-
मंडपाच्या दाराशीं ये आणि तेथें सर्व मंडळीस जमा
कर. ४ परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें मोशानें केलें; आणि
मंडळी दर्शनमंडपाच्या दाराशीं जमा झाली. ५ मोशानें
मंडळीस सांगितलें, परमेश्वरानें जें कांहीं करावयाची
आज्ञा दिली आहे तें हें :
६ मोशानें अहरोन व त्याचे पुत्र यांस आणून जलस्नान
घातलें. ७ मग त्यानें त्यास अंगरखा घातला, त्याच्या
कमरेस कमरबंद कसला, झगा पेहरविला, त्यावर एफोद
घातलें आणि बुट्टीदार पट्टी एफोदावरून आवळिली.
८ मग त्यानें त्यावर उरपट बांधिला व त्यांत उरीम
व थुम्मीम ठेविले; ९ मग त्याच्या डोक्यांत मंदील
घातला आणि मंदिलाच्या पुढल्या भागीं सुवर्णपट्टिका
म्हणजे पवित्र मुकुट लाविला; परमेश्वरानें मोशाला
आज्ञा दिल्याप्रमाणें हें झालें.
१० मग मोशानें अभिषेकाचें तेल घेऊन
निवासमंडपास व त्यांत असलेल्या सगळ्या वस्तूंस
अभ्यंग करून पवित्र केलें. ११ त्यांतलें कांहीं तेल
घेऊन त्यानें वेदीवर सात वेळां शिंपडिलें आणि वेदी,
तिचें सर्व उपकरणसाहित्य, गंगाळ व त्याची
बैठक यांस अभ्यंग करून पवित्र केलें. १२ त्यानें
अभिषेकाचें कांहीं तेल घेऊन अहरोनाच्या मस्तकावर
ओतिलें; येणेंप्रमाणें अभिषेक करून त्याला पवित्र केलें.
१३ मग मोशानें अहरोनाच्या पुत्रांस आणिलें, त्यांस अंगरखे
घातले, कमरेस कमरबंद कसले आणि त्यांस फेटे बांधिले;
परमेश्वरानें मोशास आज्ञा केली होती तसें हें झालें.
१४ मग त्यानें पापार्पणाचा गोऱ्हा आणिला आणि
अहरोन व त्याचे पुत्र यांनीं आपले हात त्या पापार्पणाच्या
गोऱ्ह्याच्या डोक्यावर ठेविले. १५ तो वधिल्यावर मोशानें
त्याचें रक्त घेऊन आपल्या बोटानें वेदीच्या शृंगांस
सभोंवार लावून ती शुद्ध केली आणि तें रक्त वेदीच्या
पायथ्यावर ओतिलें, व तिच्यासाठीं प्रायश्चित्त करून ती
पवित्र केली. १६ मोशानें आंतड्यांवरील सर्व वपा,
काळजावरला पडदा आणि वपेसहित दोन्ही गुर्दे हीं
घेऊन त्यांचा वेदीवर होम केला. १७ गोऱ्हा, त्याचें
कातडें, त्याचें मांस व त्याची विष्ठा हीं सर्व तळाबाहेर
नेऊन अग्नीनें जाळून टाकिलीं; परमेश्वरानें मोशाला आज्ञा
केली होती तसें हें झालें.
१८ मग त्यानें होमबलीचा मेंढा समीप आणिला तेव्हां
अहरोन व त्याचे पुत्र यांनीं आपले हात मेंढ्याच्या डोक्या-
वर ठेविले. १९ तो वधिल्यावर मोशानें त्याचें रक्त वेदीवर
सभोंवार शिंपडिलें. २० मग त्या मेंढ्याचे खंड केले
आणि मोशानें त्याचें डोकें, त्याचे मांसखंड आणि
वपा यांचा होम केला. २१ आंतडीं व पाय पाण्यानें
धुऊन मोशानें संपूर्ण मेंढ्याचा वेदीवर होम केला, तो
सुवासिक होमबलि झाला; तो परमेश्वराप्रीत्यर्थ हव्य
झाला; परमेश्वरानें मोशाला आज्ञा केली होती तसें हें
झालें. २२ मग त्यानें दुसरा मेंढा म्हणजे संस्कारविधीचा
मेंढा समीप आणिला, आणि अहरोन व त्याचे पुत्र
यांनीं आपले हात त्या मेंढ्याच्या डोक्यावर ठेविले.
२३ तो वधिल्यावर त्याचें कांहीं रक्त मोशानें घेऊन
अहरोनाच्या उजव्या कानाच्या शेंड्याला, उजव्या
हाताच्या अंगठ्याला व उजव्या पायाच्या अंगठ्याला
लाविलें. २४ मग मोशानें अहरोनाच्या पुत्रांस जवळ
आणून त्यांच्या उजव्या कानांच्या शेंड्याला, उजव्या
हाताच्या अंगठ्याला व उजव्या पायाच्या अंगठ्याला
रक्त लाविलें; मग मोशानें वेदीवर सभोंवार तें रक्त
शिंपडिलें. २५ त्यानें वपा, चरबीदार शेपूट, आंतड्यांवर

असलेली सर्व वपा, काळजावरला पडदा, दोन्ही गुर्दे,
त्यांवरली वपा व उजवा फरा हीं काढून घेतलीं;
२६ आणि परमेश्वरासमोर ठेविलेल्या बेखमीर
भाकरींच्या टोपलींतून एक भाकर, तेल लाविलेली एक
पोळी व एक पापडी घेऊन त्या वपेवर व उजव्या
फऱ्यावर ठेविल्या; २७ हीं सर्व त्यानें अहरोनाच्या व
त्याच्या पुत्रांच्या हातांवर ठेविलीं आणि परमेश्वरासमोर
ओवाळणीचें अर्पण म्हणून तीं ओवाळिलीं. २८ मग
मोशानें तीं त्यांच्या हातांतून घेऊन त्यांचा वेदीवरल्या
होमबलीवर होम केला, हें सुवासिक संस्कारार्पण झालें;
हें परमेश्वराप्रीत्यर्थ हव्य झालें. २९ मग मोशानें ऊर
घेऊन परमेश्वरासमोर ओवाळणीचें अर्पण म्हणून
ओवाळिला; संस्काराच्या मेंढ्याचा हा भाग मोशाचा
होता; परमेश्वरानें मोशाला आज्ञा केली होती तसें हें
झालें. ३० मग मोशानें अभिषेकाचें तेल व वेदी-
वरलें रक्त थोडेंसें घेऊन अहरोन व त्याचीं वस्त्रें, त्याचे
पुत्र व त्यांचीं वस्त्रें यांवर शिंपडिलें आणि अहरोन व
त्याचीं वस्त्रें आणि त्याचे पुत्र व त्यांचीं वस्त्रें पवित्र केलीं.

३१ मोशानें अहरोन व त्याचे पुत्र यांस सांगितलें कीं
हें मांस दर्शनमंडपाच्या दारापाशीं शिजवा आणि तेथें
संस्काराच्या टोपलींतल्या भाकरींबरोबर तें खा; अहरोन
व त्याचे पुत्र यांनीं तें खावें अशी आज्ञा मीं
दिलीच आहे. ३२ मांस व भाकरी यांपैकीं कांहीं शेष
राहिल्यास तीं अग्नींत जाळावीं; ३३ आणि तुमच्या
संस्कारविधींचे दिवस पुरे होत तोंवर म्हणजे सात
दिवस तुम्हीं दर्शनमंडपाच्या दाराबाहेर जाऊं नये,
कारण सात दिवसपर्यंत तुमचा संस्कारविधि होणार.
३४ तुम्हांप्रीत्यर्थ प्रायश्चित्त व्हावें म्हणून आज केलें
त्याप्रमाणें करण्याची आज्ञा परमेश्वरानें दिली आहे.
३५ या प्रकारें तुम्हीं दर्शनमंडपाच्या दाराशीं सात
दिवस अहोरात्र राहून परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें
वर्ता, नाहीं तर तुम्ही मराल; कारण मला अशी आज्ञा
आहे. ३६ परमेश्वरानें मोशाच्या द्वारें ज्या गोष्टींविषयीं
आज्ञा केली होती त्या सर्व अहरोन व त्याचे पुत्र
यांनीं केल्या.

९ १ आठव्या दिवशीं मोशानें अहरोन, त्याचे
पुत्र आणि इस्राएलांचे वडील यांस बोलाविलें;
२ त्यानें अहरोनास सांगितलें, पापार्पणासाठीं एक
निर्दोष गोऱ्हा व होमार्पणासाठीं एक निर्दोष मेंढा घेऊन
परमेश्वरासमोर अर्पण कर; ३ आणि इस्राएल लोकांस
असें सांग कीं तुम्ही पापार्पणासाठीं एक बकरा आणा,
आणि होमार्पणासाठीं एक गोऱ्हा व एक कोकरूं आणा,
हीं दोन्हीं एका वर्षाचीं व निर्दोष असावीं; ४ आणि
परमेश्वरासमोर शांत्यर्पणें करण्यासाठीं एक बैल, एक मेंढा
आणि तैलमिश्रित अन्नार्पण आणा, कारण आज परमेश्वर
तुम्हांस दर्शन देणार आहे. ५ मग मोशानें आज्ञा दिल्या-
प्रमाणें त्यांनीं तें सर्व दर्शनमंडपाच्या दाराशीं आणिलें
आणि सर्व मंडळी समीप जाऊन परमेश्वरासमोर उभी
राहिली. ६ तेव्हां मोशे म्हणाला, तुम्हीं जें कांहीं करावें
म्हणून परमेश्वरानें आज्ञा दिली तें हें; मग परमेश्वराचें
तेज तुमच्या दृष्टीस पडेल. ७ मोशानें अहरोनास
सांगितलें, वेदीजवळ जाऊन आपला पापबलि व होमबलि
यांचें अर्पण कर आणि स्वतांसाठीं व सर्व लोकांसाठीं
प्रायश्चित्त कर; आणि लोकांकडचे बलिहि अर्पण
करून त्यांच्यासाठीं प्रायश्चित्त कर; परमेश्वरानें आज्ञा
केल्याप्रमाणें हें कर.

८ तेव्हां अहरोनानें वेदीसमीप जाऊन आपल्या
पापार्पणाचा गोऱ्हा अर्पण केला. ९ अहरोनाचे पुत्र
त्याजपाशीं रक्त घेऊन गेले, तेव्हां त्यानें आपलें बोट
त्यांत बुडवून तें वेदीच्या शृंगांस लाविलें आणि तें
वेदीच्या पायथ्याशीं ओतिलें; १० पापबलीची वपा,
गुर्दे व काळजावरला पडदा यांचा त्यानें वेदीवर होम
केला; परमेश्वरानें मोशाला आज्ञा केली होती तसें
झालें. ११ मांस व कातडें त्यानें छावणीच्या बाहेर
नेऊन अग्नींत जाळिलें. १२ मग त्यानें होमबलीचा पशु
वधिला, तेव्हां अहरोनाच्या पुत्रांनीं त्याचें रक्त त्याजपाशीं
दिलें; त्यानें तें घेऊन वेदीवर सभोवार शिंपडिलें. १३ मग
त्यांनीं त्या होमबलीचे तुकडे करून एक एक तुकडा व
मस्तक हीं त्याजपाशीं दिलीं त्यांचा त्यानें वेदीवर होम
केला; १४ आणि त्यानें आंतडीं व पाय धुऊन त्यांचा

वेदीवरील होमबलीवर होम केला. १५ मग त्यानें लोकां-
कडचें अर्पण समीप नेऊन त्यांच्यासाठीं आणिलेला
पापार्पणाचा बकरा वधिला आणि पहिल्याप्रमाणें तोहि
पापबलि म्हणून अर्पिला; १६ आणि त्यानें होमबलिहि
समीप नेऊन विधिपूर्वक अर्पिला. १७ मग त्यानें अन्नार्पण
समीप नेलें व त्यांतलें मूठभर घेऊन त्याचा वेदीवर होम
केला; प्रातर्होमबलीखेरीज हें अर्पिण्यांत आलें. १८ बैल
आणि मेंढा जे लोकांसाठीं शांत्यर्पण म्हणून आले होते
तेहि त्यानें वधिले आणि अहरोनाच्या पुत्रांनीं त्यांचें रक्त
त्याजपाशीं दिलें, तें त्यानें वेदीवर सभोवार शिंपडिलें,
१९ आणि त्यांनीं बैलाची व मेंढ्याची वपा व मेंढ्याचें
चरबीदार शेपूट, आंतड्यावरील वपा, गुर्दे आणि
काळजावरला पडदा हीं त्याजपाशीं दिलीं; २० आणि
त्यांनीं वपा त्या बलींच्या उरावर ठेवल्यावर त्यानें तिचा
वेदीवर होम केला; २१ तथापि ऊर आणि उजवा फरा
हे मोशाच्या आज्ञेप्रमाणें अहरोनानें परमेश्वरासमोर ओवा-
ळणीचें अर्पण म्हणून ओवाळिले.

२२ मग अहरोनानें लोकांकडे वळून हात उभारून
त्यांस आशीर्वाद दिला आणि जेथें त्यानें पापार्पणबलि,
होमार्पणबलि व शांत्यर्पणबलि यांचें अर्पण केलें होतें
तेथून उतरून तो खालीं आला. २३ मग मोशे व
अहरोन दर्शनमंडपांत गेले व बाहेर येऊन त्यांनीं लोकांस
आशीर्वाद दिला, तेव्हां परमेश्वराचें तेज सर्व लोकांच्या
दृष्टीस पडलें; २४ आणि परमेश्वरापासून अग्नि निघाला
व त्यानें वेदीवरील होमबलि व वपा हीं भस्म केलीं;
हें पाहून सर्व लोकांनीं जयजयकार केला व साष्टांग
नमस्कार घातला.

१० १ मग अहरोनाचे पुत्र नादाब व अबीहू
यांनीं आपआपलीं धुपाटणीं घेऊन त्यांत अग्नि
घातला आणि त्यांवर धूप घालून तो अशास्त्रोक्त
अग्नि परमेश्वरासमोर नेला; असा अग्नि नेण्याविषयीं
परमेश्वराची आज्ञा नव्हती. २ तेव्हां परमेश्वरा-
पासून अग्नि निघाला व त्यानें त्यांस भस्म केलें
आणि ते परमेश्वरासमोर मृत्यु पावले. ३ मग मोशे
अहरोनास म्हणाला, परमेश्वरानें सांगितलें तें हें: जे
माझ्यासमीप येतील त्यांनीं मला पवित्र मानावें आणि
सर्व लोकांसमक्ष माझा महिमा व्हावा. तेव्हां अहरोन
चूप राहिला. ४ मग अहरोनाचा चुलता उज्जिएल याचे
पुत्र मिशाएल व एल्साफान यांस मोशानें बोलावून
सांगितलें कीं तुम्ही इकडे या, तुमच्या बांधवांस
पवित्रस्थानासमोरून उचलून छावणीबाहेर घेऊन जा.
५ मोशाच्या आज्ञेप्रमाणें ते आले आणि त्यांच्या
अंगरख्यांसुद्धां त्यांस उचलून छावणीबाहेर घेऊन गेले.
६ मोशानें अहरोन आणि त्याचे पुत्र एलाजार व इथा-
मार यांस सांगितलें कीं तुम्ही आपल्या डोक्याचे केस
मोकळे सोडूं नका आणि आपलीं वस्त्रें फाडूं नका; तसें
कराल तर तुम्ही मराल आणि सर्व मंडळीवर परमे-
श्वराचा कोप भडकेल; परमेश्वरानें जो हा अग्नि
पेटविला त्याबद्दल तरी तुमच्या भाऊबंदांनीं म्हणजे
सगळ्या इस्राएल घराण्यानें विलाप करावा. ७ तुम्हीं
दर्शनमंडपाच्या दाराबाहेर जाऊं नये; गेलां तर मराल;
कारण परमेश्वरानें विहित केलेल्या अभिषेकाच्या तेलानें
तुमचा अभ्यंग झाला आहे. त्यांनीं मोशाच्या सांगण्या-
प्रमाणें केलें.

८ आणखी परमेश्वरानें अहरोनास सांगितलें:
९ जेव्हां जेव्हां तुम्ही म्हणजे तूं व तुझे पुत्र दर्शन-
मंडपांत जाल तेव्हां तुम्हांपैकीं कोणीं द्राक्षारस अथवा
कोणत्याहि प्रकारचें मद्य पिऊं नये, प्याल तर मराल;
हा तुमच्यासाठीं पिढ्यानपिढ्या निरंतरचा विधि होय;
१० या प्रकारें तुम्ही पवित्र व अपवित्र, शुद्ध व
अशुद्ध यांमधला भेद पाळा; ११ आणि परमेश्वरानें
मोशाच्याद्वारें कळविलेले सर्व विधि तुम्हीं इस्राएल
लोकांस शिकवावे.

१२ मग मोशानें अहरोनास व त्याचे बाकी राहिलेले
पुत्र म्हणजे एलाजार व इथामार यांस सांगितलें
कीं परमेश्वराच्या हव्यांपैकीं जें अन्नार्पण शेष
राहील तें घेऊन वेदीपाशीं खमिरावांचून खा, कारण
तें परम पवित्र आहे; १३ तें तुम्हीं पवित्र स्थळीं खावें;
परमेश्वराच्या हव्यांपैकीं तो तुझा व तुझ्या वंशजांचा
हक्क आहे; मला अशीच आज्ञा झाली आहे. १४ ओवा-

लिलेला ऊर आणि समर्पिलेला फरा हे तुम्ही आपले पुत्र व कन्या यांसह एकाद्या शुद्ध स्थळीं बसून खा; कारण इस्राएल लोकांनीं केलेल्या शांत्यर्पणापैकीं तुला व तुझ्या मुलांबाळांस तीं हक्क म्हणून दिलीं आहेत. १५ समर्पावयाचा फरा व ओवाळावयाचा ऊर हे वपेच्या हव्यांसहित ओवाळणीचें अर्पण म्हणून परमेश्वरासमोर आणावे; हा तुझा व तुझ्या वंशजांचा निरंतरचा हक्क आहे, अशी परमेश्वराची आज्ञा आहे.

१६ मोशानें पापबलीच्या बकऱ्याचा लक्षपूर्वक शोध केला, तेव्हां त्याला आढळलें कीं तो जाळून टाकिला आहे, हें पाहून अहरोनाचे बाकी राहिलेले पुत्र एलाजार व इथामार यांजवर रागावून तो म्हणाला, १७ तुम्हीं पापबलि पवित्र स्थळीं कां खाल्ला नाहीं ? तो परम पवित्र होय व मंडळीच्या दुष्कर्मांचा भार वाहून त्यांच्यासाठीं परमेश्वरासमोर प्रायश्चित्त करावें याकरितां तो तुम्हांस दिला आहे. १८ पाहा, त्याचें रक्त पवित्रस्थानाच्या आंत आणिलें नाहीं; तुम्हीं माझ्या आज्ञेप्रमाणें त्याचें मांस पवित्र स्थळीं अवश्य खावयाचें होतें. १९ याचें उत्तर अहरोनानें मोशाला असें दिलें कीं पाहा, आज त्यांनीं पापबलि व होमबलि हे परमेश्वरापुढें अर्पण केले म्हणून मजवर अशा आपत्ति ओढवल्या आहेत; तेव्हां आज मीं पापबलि भक्षण केला असता तर परमेश्वराला बरें वाटलें असतें काय ? २० हें ऐकलें तेव्हां मोशाचें समाधान झालें.

**११** १ परमेश्वर मोशे व अहरोन यांस म्हणाला: २ इस्राएल लोकांस सांगा कीं पृथ्वीवरील सर्व पशूंपैकीं ज्यांचें मांस तुम्हीं खावें ते हे: ३ जनावरांपैकीं ज्यांचे खूर चिरलेले किंवा दुभागलेले आहेत, व जे रवंथ करितात ते सर्व तुम्हीं खावे; ४ पण जे नुसते रवंथ करणारे किंवा ज्यांचे नुसते खूर चिरलेले आहेत ते पशु खाऊं नयेत; उंट हा रवंथ करितो पण त्याचा खूर चिरलेला नाहीं, म्हणून तो तुम्हांस निषिद्ध आहे. ५ शाफान रवंथ करितो पण त्याचा खूर चिरलेला नाहीं, म्हणून तो तुम्हांस निषिद्ध आहे. ६ ससा रवंथ करितो पण त्याचा खूर चिरलेला नाहीं, म्हणून तोहि तुम्हांस निषिद्ध आहे. ७ डुकराचा खूर चिरून दुभागलेला आहे पण तो रवंथ करीत नाहीं, म्हणून तो तुम्हांस निषिद्ध आहे. ८ त्यांचें मांस खाऊं नये, त्यांच्या शवांस शिवूं नये; तुम्हांस हे सर्व निषिद्ध होत.

९ जलचरांपैकीं तुम्हीं खावे ते हे: समुद्रांत व नद्यांत संचार करणाऱ्या ज्या प्राण्यांस पंख व खवले आहेत ते तुम्हीं खावे. १० जलचरांपैकीं ज्या प्राण्यांस पंख अथवा खवले नाहींत असे समुद्रांत व नद्यांत संचार करणारे सर्व जलचर तुम्हांस अमंगळ होत; ११ तुम्हीं त्यांस अमंगळ समजावें; त्यांचें मांस खाऊं नये व त्यांचीं शवें अमंगळ समजावीं. १२ जलाशयांतल्या ज्या प्राण्यांस पंख नाहींत, व खवलेहि नाहींत ते सर्व अमंगळ समजावे.

१३ पक्ष्यांपैकीं जे अमंगळ समजून खाऊं नयेत ते हे: गरुड, लोळणारा गीध, कुरर, १४ घार, निरनिराळ्या जातींचे ससाणे, १५ प्रत्येक जातीचे कावळे, १६ शहामृग, गवळण, कोकिळ, निरनिराळ्या जातींचे बहिरीससाणे, १७ पिंगळा, करडोक, मोठा घुबड, १८ राजहंस, पाणकोळी, गिधाड, १९ बगळा, निरनिराळ्या जातींचे करकोचे, टिटवी आणि वाघूळ.

२० जितके सपक्ष प्राणी चार पायांवर चालतात ते तुम्हीं अमंगळ समजावे. २१ पण चार पायांवर चालणाऱ्या सपक्ष प्राण्यांपैकीं ज्यांना जमिनीवर उड्या मारण्यास पायांच्या वर तंगड्या असतात ते खावे; २२ त्यांपैकीं तुम्हीं खावे ते हे: निरनिराळ्या जातींचे टोळ, निरनिराळ्या जातींचे नाकतोडे, निरनिराळ्या जातींचे खरपुडे, निरनिराळ्या जातींचे गवत्येटोळ हे खावे. २३ तथापि जमिनीवर रांगणारे चार पायांचे सपक्ष प्राणी तुम्हीं अमंगळ समजावे.

२४ त्यांच्यामुळें तुम्ही अशुद्ध व्हाल; ज्या कोणास त्यांच्या शवांचा स्पर्श होईल तो संध्याकाळपर्यंत अशुचि राहावा; २५ त्यांच्या शवांचा एकादा भाग कोणीं उचलिला तर त्यानें आपलीं वस्त्रें धुऊन संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. २६ ज्या पशूचे खूर चिरलेले

असून दुभागलेले नाहींत व जो रवंथ करीत नाहीं तो
तुम्हांला निषिद्ध होय; त्यांचा ज्यास स्पर्श होईल तो
अशुचि राहावा. २७ चार पायांवर चालणाऱ्या सर्व
पशूंपैकीं जे आपल्या पंजांवर चालतात ते तुम्हांस
निषिद्ध होत; त्यांच्या शवांस जो कोणी स्पर्श करील
त्यानें संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें; २८ जो कोणी
त्यांचीं शवें उचलील त्यानें आपलीं वस्त्रें धुऊन
संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें, कारण ते तुम्हांस
निषिद्ध होत.

२९ जमिनीवर रांगणाऱ्या जिवांपैकीं तुम्हांस निषिद्ध
ते हे: मुंगूस, उंदीर, निरनिराळ्या जातींचे सरडे,
३० चौपई, घोरपड, पाल, सांडा व गुहिऱ्या सरड.
३१ जमिनीवर रांगणाऱ्यांपैकीं हीं सर्व तुम्हांस निषिद्ध
होत; जो कोणी यांच्या शवांस स्पर्श करील त्यानें
संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. ३२ त्यांच्यापैकीं
कोणी मरून एकाद्या वस्तूवर पडलें तर तीहि अशुचि
समजावी; काष्ठपात्र, वस्त्र, कातडें, तरट, किंवा
कोणत्याहि कामाचें हत्यार असो तें पाण्यांत टाकावें व
संध्याकाळपर्यंत अशुचि असावें; मग त्यास स्पर्श
करावा. ३३ यांपैकीं एकादें मातीच्या पात्रांत पडलें
तर त्या पात्रांत जें कांहीं असेल तें अशुचि होईल व
तें पात्र फोडून टाकावें; ३४ जो खावयास योग्य
असून ज्यांत पाणी पडत असतें असा त्यांतला
पदार्थ अशुचि समजावा आणि असल्या पात्रांत कांहीं
पेय असलें तर तेंहि अशुचि समजावें; ३५ आणि
त्यांच्या शवांचा एकादा भाग भट्टीवर किंवा चुलीवर
पडला तर ती अशुचि समजून मोडून टाकावी; कारण
त्यानें ती अशुचि होते, व तुम्हीं ती अशुचि
समजावी. ३६ झरा किंवा विहीर जींत पाण्याचा
संचय असतो ती शुद्धच राहते; तरी तींतल्या शवाला
ज्याचा स्पर्श होईल तें अशुचि समजावें. ३७ त्यांच्या
शवांचा कांहीं भाग पेरण्याच्या बियाण्यावर पडला तरी
तें बियाणें शुद्ध समजावें. ३८ तथापि त्या बियाण्यावर
पाणी शिंपडिलें असून त्यावर त्या प्राण्यांचीं शवें
पडलीं तर तें तुम्हांस अशुचि होय.

३९ खाण्याच्या पशूंपैकीं एकादा मेला तर त्याच्या
शवास शिवणाऱ्यानें संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें.
४० त्याच्या शवाचा कांहीं भाग त्यानें खाल्ला तर त्यानें
आपलीं वस्त्रें धुऊन संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें;
त्याचें शव उचलणाऱ्यानेंहि आपलीं वस्त्रें धुऊन
संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें.

४१ जमिनीवर रांगत चालणारे सर्व प्राणी अमंगळ
आहेत; ते खाऊं नयेत. ४२ जमिनीवर रांगणाऱ्यां-
पैकीं जे पोटावर चालतात अथवा चार पायांवर
चालतात व ज्यांस पुष्कळ पाय आहेत ते कांहीं तुम्हीं
खाऊं नयेत; ते अमंगळ होत. ४३ तुम्हीं कोणत्याहि
जातीच्या रांगत चालणाऱ्या प्राण्यांमुळें अमंगळ होऊं
नये, अथवा त्यांच्या द्वारें अशुचि होऊन विटाळ पावूं
नये. ४४ मी परमेश्वर तुमचा देव आहें म्हणून
आपणांस पवित्र करून पवित्र राहा; कारण मी पवित्र
आहें; म्हणून तुम्ही जमिनीवर रांगत चालणाऱ्या
कोणत्याहि जातीच्या प्राण्यामुळें आपणांस विटाळवूं नका.
४५ कारण तुमचा देव व्हावें म्हणून ज्या परमेश्वरानें
तुम्हांस मिसर देशांतून इकडे आणिलें तोच मी आहें;
मी पवित्र आहें, म्हणून तुम्हीहि पवित्र व्हा.

४६ पशु, पक्षी, सर्व जलचर व जमिनीवर
रांगणारे सर्व प्राणी यांच्यासंबंधानें ४७ अशुद्ध व शुद्ध,
भक्ष्य व अभक्ष्य प्राणी यांतला भेद पाहण्याचा हा
नियम होय.

१२ १ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्राएल
लोकांस सांग: स्त्री गर्भवती होऊन तिला मुलगा
झाल्यावर तिनें सात दिवस अशुचि राहावें;
ऋतुकालीं जशी ती दूर बसते तशीच ती अशुचि
समजावी. ३ आठव्या दिवशीं त्या मुलाची सुंता
करावी. ४ नंतर त्या स्त्रीनें आपल्या रक्तस्रावापासून
शुद्ध होण्यासाठीं तेहतीस दिवस घालवावे; तिची शुद्धि
होण्याची मुदत पुरी होईपर्यंत तिनें कोणत्याहि पवित्र
वस्तूला स्पर्श करूं नये व पवित्रस्थानांत जाऊं नये.
५ तिला मुलगी झाली तर ऋतुकालीं ती दूर बसते
त्याप्रमाणें तिनें चौदा दिवस अशुचि राहावें,

आणि आपल्या रक्तस्रावापासून शुद्ध होण्यासाठीं सहासष्ट दिवस घालवावे.

६ तिला मुलगा किंवा मुलगी होऊन शुद्ध होण्याची मुदत पुरी झाली म्हणजे तिनें होमबलीसाठीं एक वर्षाचा मेंढा आणि पापबलीसाठीं पारव्याचें पिलूं किंवा होला दर्शनमंडपाच्या दारापाशीं याजकाकडे घेऊन जावें. ७ मग याजकानें तें परमेश्वरापुढें अर्पून तिच्यासाठीं प्रायश्चित्त करावें, म्हणजे ती आपल्या रक्तस्रावापासून शुद्ध होईल; ज्या स्त्रीला मुलगा किंवा मुलगी होईल तिजविषयींचा नियम हा. ८ तिला मेंढा अर्पिण्याची शक्ति नसली तर तिनें दोन होले अथवा पारव्याचीं दोन पिलें, एक होमबलीसाठीं व दुसरें पापबलीसाठीं, आणावीं, आणि याजकानें तिजसाठीं प्रायश्चित्त करावें म्हणजे ती शुद्ध होईल.

## १३

१ परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस सांगितलें : २ कोणा मनुष्याच्या कातडीस सूज, खवंद अथवा पांढरा डाग असला व तो महारोगाचा चट्टा आहे असें दिसलें तर त्यास अहरोन याजकाकडे किंवा त्याचे पुत्र जे याजक त्यांतल्या एकाकडे न्यावें; ३ मग याजकानें अंगाच्या चामडीवरला तो चट्टा तपासावा आणि त्यांत असलेले केस पांढरे झाले असल्यास, आणि तो चामडीहून खोल गेलेला दिसल्यास, तो महारोगाचा चट्टा समजावा; त्या मनुष्याची याजकानें अशी तपासणी करून त्यास अशुद्ध ठरवावें; ४ त्याच्या अंगाच्या चामडीवरला डाग पांढरा असला पण त्याच्या चामडीपेक्षां तो खोल गेला नसला व त्यावरचे केस पांढरे झाले नसले, तर याजकानें चट्टा पडलेल्या त्या माणसास सात दिवस कोंडून ठेवावें; ५ सातव्या दिवशीं याजकानें पुनः त्याची तपासणी करावी आणि तो चट्टा जशाचा तसाच असून चामडींत आणखी पसरला नाहीं असें त्यास दिसून आलें तर याजकानें त्याला आणखी सात दिवस कोंडून ठेवावें; ६ सातवे दिवशीं याजकानें पुनः त्यास तपासावें आणि चट्टा बुजत चालला आहे व चामडींत तो पसरला नाहीं असें त्याला दिसून आलें तर याजकानें त्यास शुद्ध ठरवावें; कारण तें साधारण खवंद होय; त्यानें आपलीं वस्त्रें धुऊन शुद्ध व्हावें. ७ तरी पण आपण शुद्ध ठरावें म्हणून याजकाला दाखविल्यानंतर चामडीचा तो डाग फार पसरत गेला तर त्या मनुष्यानें पुनः तो याजकाला दाखवावा; ८ याजकानें तपासणी करावी आणि तो डाग चामडींत पसरला आहे असें त्याला दिसून आल्यास त्यानें त्यास अशुद्ध ठरवावें; तो महारोग होय.

९ कोणा मनुष्याच्या अंगास महारोगाचा चट्टा असल्यास त्याला याजकाकडे घेऊन जावें; १० याजकानें तपासणी करावी आणि जर त्याच्या चामडींत पांढरी सूज आली असली व त्यामुळें तेथले केस पांढरे झाले असले व तेथलें मांस मुडदार झालें असलें, ११ तर त्याच्या चामडींतला तो जुना महारोग होय; याजकानें त्यास अशुद्ध ठरवावें; त्याला त्यानें कोंडून ठेवूं नये; तो अशुद्धच होय. १२ एकाद्याच्या चामडीस महारोग फुटून तो नखशिखांत सर्व अंगभर पसरला आहे असें याजकास दिसून आलें, १३ तर त्यानें तपासणी करावी आणि त्याच्या सर्वांगास महारोग झाला असल्यास त्यानें त्या चट्टा पडलेल्या मनुष्यास शुद्ध ठरवावें; त्याचें सर्वांग शुभ्र झालें म्हणून तो शुद्ध होय. १४ त्याच्या अंगावरचें कांहीं मांस मुडदार दिसून आलें तर तो अशुद्ध समजावा. १५ याजकानें मुडदार मांस पाहून त्याला अशुद्ध ठरवावें; कारण असलें मांस अशुद्धच असतें; तो महारोग होय. १६ पण तें मुडदार मांस पालटून पांढरें झालें तर त्यानें पुन्हां याजकाकडे यावें; १७ याजकानें त्याला तपासावें, आणि जर त्याचा चट्टा पालटून पांढरा झाला असला तर त्यानें त्या चट्टा पडलेल्या माणसास शुद्ध ठरवावें, तो शुद्ध होय.

१८ कोणाच्या चामडीस फोड येऊन तो बरा झाला, १९ व फोडाच्या जागीं पांढरी सूज आली अथवा लालसर पांढरा डाग पडला तर त्यानें तो याजकास दाखवावा; २० याजकानें तपासणी करावी आणि जर चामडीपेक्षां ती जागा खोल गेलेली दिसली व त्यावरले

केस पांढरे झाले असले तर त्यास अशुद्ध
ठरवावें; हा फोडांतून बाहेर फुटलेला महारोगाचा
चट्टा होय. २१ त्यावरचे केस पांढरे नाहींत व ती
जागा चामडीपेक्षां खोल गेली नाहीं व ती बुजत
चालली आहे असें तपासाअंतीं याजकास दिसून आलें
तर त्यानें त्या मनुष्यास सात दिवस कोंडून ठेवावें;
२२ तेवढ्या मुदतींत तो चामडीवर पसरला आहे असें
दिसलें तर याजकानें त्या मनुष्यास अशुद्ध ठरवावें व
तो महारोगाचा चट्टा समजावा. २३ तो पांढरा
डाग जेवढ्याचा तेवढा राहून पसरला नाहीं तर तो
फोडाचा वण आहे असें समजून याजकानें त्या
मनुष्यास शुद्ध ठरवावें.

२४ कोणाच्या चामडींत जळल्याचा वण असेल व
त्या वणाच्या मुडदार मांसांत लालसर पांढरा
किंवा नुसता पांढरा डाग दिसून येईल; २५ आणि
याजकास तपासाअंतीं असें दिसून येईल कीं त्या
पांढऱ्या जागेवरचे केस पांढरे झाले आहेत व
चामडीपेक्षां ती जागा खोल गेली आहे, तर त्या
जळलेल्या भागीं महारोग फुटला आहे असें समजावें;
याजकानें त्यास अशुद्ध ठरवावें, कारण तो महारोगाचा
चट्टा होय. २६ तरी पण याजकास असें दिसून येईल
कीं त्या पांढऱ्या जागेवर कांहीं पांढरे केस नाहींत व
चामडीहून ती खोल गेलेली नाहीं, बुजत चालली
आहे, तर त्यानें त्यास सात दिवस कोंडून ठेवावें;
२७ सातव्या दिवशीं त्यानें त्यास तपासून पाहावें;
चामडीवर तो रोग पसरला आहे असें दिसल्यास
त्यानें त्यास अशुद्ध ठरवावें; तो महारोगाचा चट्टा
होय. २८ पण पांढरा डाग जेवढ्याचा तेवढाच आहे,
चामडीवर पसरला नाहीं व तो बुजून जात आहे, तर
ती जळलेल्या जागेची सूज समजावी व याजकानें
त्यास शुद्ध ठरवावें; तो केवळ त्या जळलेल्या
जागेवरला वण होय.

२९ कोणा पुरुषाच्या किंवा स्त्रीच्या डोक्यावर अथवा
हनवटीवर चट्टा असला तर, ३० याजकानें त्याची
तपासणी करावी आणि ती जागा चामडीपेक्षां खोल
दिसली व तिच्यावर कांहीं पिंगट बारीक केस असले तर
त्यानें त्या मनुष्यास अशुद्ध ठरवावें; ही चाई
डोक्याचा अथवा हनवटीचा महारोग होय.
३१ याजकानें हा चाईचा चट्टा तपासून पाहावा व तो
चामडीहून खोल नसला व त्यावर काळे केस नसले
तर चाईचा चट्टा असलेल्या त्या मनुष्यास त्यानें सात
दिवस कोंडून ठेवावें. ३२ सातव्या दिवशीं त्यानें
पुन्हां त्या चट्ट्याची तपासणी करावी; ती चाई
पसरली नाहीं, त्यावर कांहीं पिंगट केस नाहींत व
चाईची जागा चामडीहून खोलवट झालेली नाहीं असें
त्याला दिसून आलें, ३३ तर त्या मनुष्याचें मुंडण
करवावें; पण चाईवरले केस काढूं नयेत; याजकानें त्या
चाई लागलेल्या मनुष्यास आणखी सात दिवस कोंडून
ठेवावें. ३४ सातव्या दिवशीं याजकानें ती चाई पुनः
तपासून पाहावी, आणि त्यास असें दिसून आलें कीं चाई
चामडीवर पसरली नाहीं व चामडीपेक्षां ती खोल
गेली नाहीं तर त्यानें त्यास शुद्ध ठरवावें; त्या मनुष्यानें
आपलीं वस्त्रें धुवावीं व शुद्ध व्हावें. ३५ तरी पण तो शुद्ध
ठरल्यानंतर ती चाई पसरत गेली तर ३६ याजकानें
त्याला तपासावें व ती चाई चामडीवर पसरली आहे
असें दिसून आलें तर पिंगट केस शोधीत न
बसतां त्या मनुष्यास अशुद्ध ठरवावें. ३७ ती चाई
जेवढीची तेवढी आहे व तिजवर काळे केस आले
आहेत असें दिसून आलें तर ती चाई बरी झाली
असून तो शुद्ध होय; याजकानें त्याला शुद्ध ठरवावें.

३८ कोणा पुरुषाच्या किंवा स्त्रीच्या अंगावर पांढरे
तकतकीत डाग असले तर ३९ याजकानें ते
तपासावे व त्याच्या अंगाच्या चामडींतले ते डाग भुरे
असले तर ती चामडीवर फुटलेली दाद समजावी; तो
मनुष्य शुद्ध होय.

४० कोणा मनुष्याच्या डोक्याचे केस झडून त्याला
टक्कल पडलें तरी तो शुद्ध समजावा. ४१ त्याच्या
कपाळाच्या पुढल्या भागाचे केस झडून त्याला टक्कल
पडलें असलें तरी त्यास शुद्ध समजावें. ४२ तथापि
त्या टक्कल पडलेल्या डोक्यावरच्या किंवा कपाळावरच्या

बाजूस कांहींसा लालसर पांढरा चट्टा पडला तर असें समजावें कीं त्या टक्कल पडलेल्या डोक्यावर किंवा कपाळावर महारोग फुटून निघत आहे. ४३ मग याजकानें त्यास तपासून पाहावें, आणि त्याच्या डोक्याच्या टकलांत अथवा कपाळाच्या वरल्या भागीं अंगाच्या चामडीवर महारोगासारखा तांबूस पांढरा चट्टा आहे असें त्याला दिसून आलें, ४४ तर तो मनुष्य महारोगी असून अशुद्ध होय; याजकानें त्याला अवश्य अशुद्ध ठरवावें; त्याच्या डोक्याला झालेला तो महारोगाचा चट्टा होय.

४५ ज्या महारोग्याच्या अंगावर हा चट्टा असेल त्याचीं वस्त्रें फाडिलेलीं असावीं, त्याच्या डोक्याचे केस सोडलेले असावे, त्यानें आपला वरला ओंठ झांकून ठेवावा आणि अशुद्ध अशुद्ध असें ओरडत राहावें. ४६ जितके दिवस हा चट्टा त्याच्या अंगावर राहील तितके दिवस त्यानें अशुचि राहावें; तो अशुद्ध होय, त्यानें एकटें राहावें, छावणीबाहेर त्याची वस्ती असावी.

४७ एकाद्या वस्त्राला, मग तें वस्त्र लोकरीचें असो कीं सणाचें असो, महारोगाचा चट्टा पडला, ४८ अथवा तो सणाच्या किंवा लोकरीच्या ताण्याला किंवा बाण्याला, चामड्याला किंवा चामड्याच्या बनविलेल्या एकाद्या वस्तूला पडला, ४९ आणि त्या वस्त्रास, चामड्यास, ताण्यास किंवा बाण्यास अथवा चामड्याच्या वस्तूस पडलेला तो चट्टा हिरवट अथवा तांबूस असला तर तो महारोगाचा चट्टा समजावा, आणि याजकाला तो दाखवावा; ५० याजकानें तो तपासावा; चट्टा पडलेली वस्तु सात दिवस त्यानें बंद करून ठेवावी; ५१ त्यानें सातव्या दिवशीं तो चट्टा तपासून पाहावा आणि वस्त्राच्या ताण्यावर किंवा बाण्यावर, चामड्यावर किंवा चामड्याच्या कोणत्याहि वस्तूवर तो चट्टा पसरला आहे असें दिसलें तर तें चरत जाणारें कुष्ठ समजावें; ती वस्तु अशुद्ध होय. ५२ तें वस्त्र लोकरीचें असो अथवा सणाचें असो, त्याच्या ताण्यांत व बाण्यांत, तसेंच चामड्यांत व चामड्याच्या एकाद्या वस्तूंत तो चट्टा असला तर तें चरत जाणारें कुष्ठ असल्यामुळें ती वस्तु अग्नीनें जाळून टाकिली पाहिजे.

५३ तपासणीअंतीं जर याजकास दिसून आलें कीं वस्त्राच्या ताण्यांत अथवा बाण्यांत किंवा चामड्याच्या केलेल्या एकाद्या वस्तूंत तो चट्टा पसरत नाहीं, ५४ तर चट्टा असलेली वस्तु धुऊन टाकण्याची आज्ञा याजकानें करावी आणि आणखी सात दिवस ती बंद करून ठेवावी; ५५ ती वस्तु धुतल्यावर याजकानें पाहावी, आणि त्या चट्ट्याचा रंग बदलला नसून तो डाग पसरला नसला तरी तो अशुद्ध समजावा; ती वस्तु अग्नींत जाळावी; तो चट्टा आंतल्या बाजूस असो किंवा बाहेरल्या बाजूस असो, तो चरत जाणारा चट्टा समजावा.

५६ धुतल्यानें त्या डागाचा तकतकीतपणा कमी झाला आहे असें याजकाच्या नजरेस आलें तर त्यानें त्या वस्त्राच्या ताण्याचा किंवा बाण्याचा किंवा चामड्याच्या वस्तूचा तेवढाच भाग फाडून काढावा; ५७ इतकें करूनहि जर वस्त्राच्या ताण्यांत अथवा बाण्यांत अथवा चामड्याच्या वस्तूंत तो चट्टा पुनः फुटून निघाला तर ती चट्टा फुटलेली वस्तु अग्नीनें जाळून टाकावी. ५८ वस्त्राचा ताणा अथवा बाणा किंवा चामड्याची कोणतीहि वस्तु धुतल्यावर त्याचा तो डाग नाहींसा झाला तर ती वस्तु पुनः एकदा धुवावी म्हणजे ती शुद्ध होईल.

५९ लोकरीच्या किंवा सणाच्या वस्त्राच्या ताण्यांत अथवा बाण्यांत अथवा चामड्याच्या एकाद्या वस्तूंत महारोगाचा डाग दिसून आला तर तें शुद्ध किंवा अशुद्ध ठरविण्याचा हा नियम होय.

१४ १ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, २ महारोग्यास शुद्ध ठरविण्याच्या वेळचा नियम हा: त्याला याजकाकडे आणावें; ३ याजकानें छावणीबाहेर जाऊन त्या महारोग्यास तपासून पाहावें, व त्याच्या अंगावरचा महारोगाचा चट्टा बरा झाला आहे असें त्यास दिसून आलें तर ४ त्यानें आज्ञा करावी कीं ज्यास शुद्ध करावयाचें आहे त्याजसाठीं दोन जीवंत शुद्ध पक्षी, गंधसरूचें लाकूड, किरमिजी रंगाचें

कापड व एजोब हीं सर्व घेऊन यावें; ५ मग
याजकानें आज्ञा करावी कीं वाहत्या पाण्यावर मातीच्या
पात्रांत त्यांतला एक पक्षी मारावा; ६ आणि
राहिलेला जीवंत पक्षी, गंधसरूचें लाकूड, किरमिजी
रंगाचें कापड आणि एजोब हीं सर्व घेऊन वाहत्या
पाण्यावर मारलेल्या पक्ष्याच्या रक्तांत त्यानें बुडवावीं;
७ आणि तें महारोगापासून शुद्ध ठरवावयाच्या मनु-
ष्यावर सात वेळां शिंपडावें; मग तो शुद्ध झाला आहे
असें सांगून त्या जीवंत पक्ष्यास रानांत सोडून द्यावें;
८ आणि शुद्ध होणाऱ्या मनुष्यानें आपले कपडे
धुवावे, आपले सर्व केस मुंडवावे आणि पाण्यानें स्नान
करावें, मग तो शुद्ध ठरेल; त्यानंतर त्यानें छावणींत
यावें; तरी त्यानें सात दिवस आपल्या तंबूबाहेर
राहावें. ९ सातव्या दिवशीं त्यानें आपलें डोकें, दाढी,
भुवया हीं म्हणजे अर्थात् अंगावरले एकंदर सर्व केस
मुंडावे; आपलीं वस्त्रें धुवावीं व पाण्यानें स्नान करावें,
म्हणजे तो शुद्ध ठरेल.

१० आठव्या दिवशीं दोन निर्दोष कोकरें, एका
वर्षाची निर्दोष मेंढी, अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेलें
तीन दशांश एफा सपीठ व एक लोगभर तेल हीं सर्व
आणावीं; ११ आणि शुद्धि करणाऱ्या याजकानें शुद्ध
करावयाच्या मनुष्यास ह्या सर्व वस्तूंसह परमेश्वरासमोर
दर्शनमंडपाच्या दाराशीं उभें करावें. १२ मग याजकानें
दोषार्पणासाठीं एक कोकरूं आणि एक लोगभर तेल अशीं
अर्पावीं आणि तीं परमेश्वरासमोर ओवाळणीचें अर्पण
म्हणून ओवाळावीं; १३ आणि पवित्रस्थानांत जेथें
पापबलि व होमबलि वधितात तेथें तें कोकरूं मारावें;
कारण पापबलिप्रमाणेंच दोषबलिवरहि याजकाचा हक्क
आहे; हें अर्पण परम पवित्र होय; १४ मग याजकानें
दोषबलीचें कांहीं रक्त घेऊन शुद्ध ठरवावयाच्या
मनुष्याच्या उजव्या कानाच्या शेंड्याला, उजव्या
हाताच्या अंगठ्याला आणि उजव्या पायाच्या अंगठ्याला
लावावें; १५ याजकानें लोगभर तेलांतलें थोडेंसें
तेल आपल्या डाव्या हाताच्या तळव्यावर ओतावें;
१६ त्यानें आपल्या उजव्या हाताचें बोट आपल्या
डाव्या हातावरल्या तेलांत बुडवून त्यांतलें कांहीं
परमेश्वरासमोर सात वेळां बोटानें शिंपडावें;
१७ त्याच्या तळहातावर जें तेल शिल्लक राहील
त्यांतलें कांहीं घेऊन याजकानें शुद्ध ठरवावयाच्या
मनुष्याच्या उजव्या कानाच्या शेंड्याला व उजव्या
हाताच्या व उजव्या पायाच्या अंगठ्यांना दोषबलीच्या
रक्तावर लावावें; १८ तळहातावर शिल्लक राहिलेलें
तेल त्यानें शुद्ध ठरवावयाच्या मनुष्याच्या मस्तकाला
लावावें आणि त्याच्यासाठीं त्यानें परमेश्वरासमोर
प्रायश्चित्त करावें. १९ मग याजकानें पापबलि
अर्पावा आणि अशुद्धतेपासून शुद्ध ठरवावयाच्या त्या
मनुष्यासाठीं प्रायश्चित्त करावें; मग त्यानें होमबलि
वधावा. २० याजकानें होमबलि व अन्नबलि वेदीवर
अर्पावे आणि त्याच्यासाठीं प्रायश्चित्त करावें, म्हणजे
तो शुद्ध ठरेल.

२१ तो गरीब असून एवढें आणण्याचें त्याला
सामर्थ्य नसलें तर त्यानें आपल्या प्रायश्चित्तासाठीं
ओवाळणीचें एक कोकरूं दोषार्पण म्हणून आणावें,
आणि अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेलें एक दशांश एफा
सपीठ आणि लोगभर तेल आणावें; २२ आणि त्याला
मिळतील तसे दोन होले अथवा पारव्याचीं दोन
पिलें आणावीं; त्यांतला एक पापबलि व दुसरा
होमबलि व्हावा. २३ आठव्या दिवशीं आपल्या
शुद्धीकरणासाठीं त्यानें हें सर्व घेऊन दर्शनमंडपाच्या
दाराशीं याजकाकडे परमेश्वरासमोर जावें. २४ मग
याजकानें तें दोषार्पणाचें कोकरूं व लोगभर तेल घेऊन
ओवाळणीचें अर्पण म्हणून परमेश्वरासमोर ओवाळावें;
२५ मग दोषार्पणाचें कोकरूं मारावें आणि याजकानें
त्याचें थोडेंसें रक्त घेऊन शुद्ध ठरवावयाच्या मनुष्याच्या
उजव्या कानाच्या शेंड्याला आणि उजव्या हाताच्या
आणि उजव्या पायाच्या अंगठ्यांना लावावें. २६ याज-
कानें त्या तेलांतलें कांहीं आपल्या डाव्या हाताच्या
तळव्यावर ओतावें, २७ आणि आपल्या उजव्या हाताचें
बोट आपल्या डाव्या हाताच्या तळव्यावरल्या तेलांत

१ अथवा : जुफा.

बुडवून त्यांतलें कांहीं परमेश्वरासमोर सात वेळां शिंपडावें.
२८ मग याजकानें आपल्या तळव्यावरलें कांहीं तेल घेऊन
ज्यास शुद्ध ठरवावयाचें त्या मनुष्याच्या उजव्या कानाच्या
शेंडीला आणि उजव्या हाताच्या व उजव्या पायाच्या
अंगठ्यांला दोषबलीच्या रक्तावर लावावें; २९ याजकाच्या
हातावर तेल राहील तें शुद्ध ठरवावयाच्या मनुष्याच्या
मस्तकावर परमेश्वरासमोर त्याच्यासाठीं प्रायश्चित्त
म्हणून ओतावें. ३० मग त्याला मिळाले असतील
ते होले अथवा पारव्याचीं पिलें यांपैकीं एकाचें त्यानें
अर्पण करावें; ३१ त्याला जे पक्षी मिळाले असतील
त्यांपैकीं एकाचें पापार्पण करावें व दुसऱ्याचें अन्नार्पणा-
सहित होमार्पण करावें; या प्रकारें याजकानें शुद्ध
ठरवावयाच्या मनुष्यासाठीं परमेश्वरासमोर प्रायश्चित्त
करावें. ३२ अंगावर महारोगाचा चट्टा असलेल्या
ज्या मनुष्यास शुद्धीकरणाची सामग्री मिळविण्याचें
सामर्थ्य नसेल त्याच्यासंबंधाचा हा नियम होय.

३३ परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस सांगितलें:
३४ जो कनान देश मी तुम्हांस वतन करून देत आहें
त्यांत तुम्ही जाऊन पोहंचाल तेव्हां तुमच्या वतनी
देशांतल्या एकाद्या घराला मीं महारोगाचा चट्टा
उमटविला, ३५ तर ज्याचें तें घर असेल त्यानें
याजकास जाऊन सांगावें कीं माझ्या घराला महा-
रोगाच्या चट्ट्यासारखें कांहीं दिसतें. ३६ मग याजकानें
आज्ञा करावी कीं मी जाऊन घर पाहीन त्यापूर्वी तें
रिकामें करावें; नाहींतर एकाद्या वेळीं घरांतल्या सर्व
वस्तु अशुद्ध ठरावयाच्या. नंतर याजकानें आंत जाऊन
घर तपासावें; ३७ तो चट्टा त्यानें पाहावा आणि
घराच्या भिंतीवर हिरवट अथवा लालसर रंगाच्या
खोल रेघा पडल्या असल्या आणि त्या भिंतींत
खोल गेल्या असल्या तर ३८ याजकानें घरांतून
दाराबाहेर जावें आणि सात दिवस तें घर बंद करून
ठेवावें; ३९ सातव्या दिवशीं याजकानें तें घर पुनः
जाऊन पाहावें आणि जर तो चट्टा घराच्या भिंतीवर
पसरला आहे असें दिसलें तर ४० याजकानें अशी
आज्ञा करावी कीं डाग असलेले धोंडे काढून नगरा-
बाहेर एकाद्या अशुद्ध स्थळीं फेकून द्यावे; ४१ आणि
घर आंतून चोहोंकडून खरवडावें आणि खरवडून
काढलेला चुना त्यांनीं नगराबाहेर अशुद्ध स्थळीं टाकून
द्यावा. ४२ मग त्या दगडांच्या ऐवजीं दुसरे दगड
बसवावे आणि त्या घरास नव्या चुन्याचा गिलावा
करावा.

४३ दगड काढिल्यावर आणि घर खरवडून नवीन
गिलावा केल्यावर जर पुनः तो चट्टा उद्भवला,
४४ तर याजकानें येऊन तो पाहावा आणि घरांत तो
पसरला आहे असें त्याला दिसलें तर तो घराचें चरत
जाणारें कुष्ठ आहे असें त्यानें ठरवावें; तें अशुद्ध होय.
४५ मग त्यानें तें घर खणून पाडावें; त्याचे दगड,
लाकूड व सगळा चुना त्यानें तेथून काढून नगराबाहेर
एकाद्या अशुद्ध स्थळीं फेकून द्यावा. ४६ घर बंद
असतांना जर कोणी त्यांत जाऊन राहिला तर तो
संध्याकाळपर्यंत अशुचि राहावा; ४७ आणि कोणी
त्या घरांत निजला तर त्यानें आपलीं वस्त्रें धुवावीं;
त्याप्रमाणेंच त्या घरांत कोणी अन्न खाईल तर त्यानेंहि
आपलीं वस्त्रें धुवावीं. ४८ याजकानें आंत जाऊन
पाहिल्यावर त्याला जर दिसून आलें कीं घराला
गिलावा केल्यावर कांहीं चट्टा उद्भवला नाहीं, तर त्याचा
तो चट्टा दूर झाल्याकारणानें त्यानें तें शुद्ध ठरवावें.
४९ त्या घराच्या शुद्धीकरणासाठीं दोन पक्षी, गंधसरूचें
लाकूड, किरमिजी रंगाचें कापड आणि एजोब हीं
त्यानें आणावीं; ५० त्यानें एक पक्षी वाहत्या पाण्यावर
मातीच्या पात्रांत मारावा; ५१ मग त्यानें गंधसरूचें
लाकूड, एजोब, किरमिजी रंगाचें कापड व तो जीवंत
पक्षी हीं घेऊन त्या मारिलेल्या पक्षाच्या रक्तांत आणि
वाहत्या पाण्यांत बुडवून त्या घराचें सात वेळां सिंचन
करावें; ५२ त्या पक्ष्याचें रक्त, वाहतें पाणी, तो
जीवंत पक्षी, गंधसरूचें लाकूड, एजोब आणि
किरमिजी रंगाचें कापड यांच्या योगें त्यानें तें घर शुद्ध
करावें. ५३ मग त्यानें तो जीवंत पक्षी नगराबाहेर
मैदानांत सोडून द्यावा; या प्रकारें त्यानें घराचें प्रायश्चित्त
केलें म्हणजे तें शुद्ध ठरेल.

५४ सर्व प्रकारचा महारोग, चाई, ५५ वस्त्रावरला अथवा घराचा महारोग, ५६ सूज, खवंद, पांढरा डाग या सर्वांसंबंधाचा हा नियम; ५७ हीं शुद्ध केव्हां व अशुद्ध केव्हां हें ठरविण्यासंबंधाचा हा नियम. हा महारोगाविषयींचा नियम होय.

१५ १ परमेश्वर मोशे व अहरोन यांस म्हणाला, २ इस्राएल लोकांस सांगा: ज्या कोणा पुरुषाच्या देहांतून स्राव होईल तो अशुद्ध समजावा. ३ हा स्राव होत असो किंवा बंद पडो, ती त्याची अशुद्धताच होय. ४ स्राव होणारा मनुष्य ज्या कोणत्या बिछान्यावर निजेल तो अशुद्ध समजावा आणि ज्या कोणत्याहि वस्तूवर तो बसेल ती अशुद्ध समजावी. ५ जो कोणी त्याच्या बिछान्यास शिवेल त्यानें आपलीं वस्त्रें धुवावीं, पाण्यानें स्नान करावें आणि संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. ६ स्राव होणारा मनुष्य ज्या वस्तूवर बसतो तिजवर कोणी बसला तर त्यानें आपलीं वस्त्रें धुवावीं, पाण्यानें स्नान करावें आणि संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. ७ स्राव होणाऱ्या मनुष्याच्या अंगाला कोणी शिवला तर त्यानें आपलीं वस्त्रें धुवावीं, पाण्यानें स्नान करावें आणि संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. ८ स्राव होणारा मनुष्य कोणा शुद्ध मनुष्यावर थुंकला तर त्या मनुष्यानें आपलीं वस्त्रें धुवावीं, पाण्यानें स्नान करावें आणि संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. ९ स्राव होणारा मनुष्य ज्या वाहनाचा उपयोग करील तें अशुद्ध समजावें. १० त्याच्या अंगाखालच्या एखाद्या वस्तूला कोणी शिवला तर त्यानें संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें, व त्या वस्तु जो कोणी उचलील त्यानें आपलीं वस्त्रें धुवावीं, पाण्यानें स्नान करावें आणि संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. ११ स्राव होणारा मनुष्य पाण्यानें हात धुतल्यावांचून कोणा मनुष्यास शिवला तर त्यानें आपलीं वस्त्रें धुवावीं, पाण्यानें स्नान करावें आणि संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. १२ स्राव होणारा मनुष्य एखाद्या मातीच्या पात्रास शिवला तर तें पात्र फोडून टाकावें; तो शिवला तें पात्र लाकडाचें असल्यास पाण्यानें धुवावें.

१३ स्राव होणारा मनुष्य आपल्या स्रावापासून बरा झाला तर आपल्या शुद्धीकरणासाठीं त्यानें सात दिवस गणावे आणि मग आपलीं वस्त्रें धुऊन वाहत्या पाण्यांत स्नान करावें, म्हणजे तो शुद्ध ठरेल. १४ आठव्या दिवशीं त्यानें दोन होले अथवा पारव्याचीं दोन पिलें घेऊन दर्शनमंडपाच्या दारीं परमेश्वरासमोर जाऊन याजकाकडे तीं द्यावीं; १५ मग याजकानें त्यांतल्या एकाचें पापार्पण व दुसऱ्याचें होमार्पण करावें आणि त्याच्या स्रावास्तव परमेश्वरासमोर त्याच्यासाठीं प्रायश्चित्त करावें.

१६ कोणा पुरुषाचा रेतपात झाला तर त्यानें आपलें सर्व अंग पाण्यानें धुऊन संध्याकाळपर्यंत अशुद्ध राहावें. १७ ज्या वस्त्रावर अथवा चामड्यावर रेतपात झाला असेल तेंहि पाण्यानें धुऊन संध्याकाळपर्यंत अशुचि समजावें. १८ पुरुषानें स्त्रीशीं संग केला असतां त्या दोघांनीं पाण्यानें स्नान करून संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें.

१९ कोणी स्त्री ऋतुमती झाली तर तिनें सात दिवस अशुचि राहावें; जो कोणी तिला स्पर्श करील त्यानें संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें; २० ती अशुचि असेल तोंवर ज्या वस्तूंवर ती निजेल किंवा बसेल त्या सर्व अशुचि समजाव्या. २१ जो कोणी तिच्या बिछान्यास स्पर्श करील त्यानें आपलीं वस्त्रें धुवावीं, पाण्यानें स्नान करावें आणि संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. २२ ती बसलेल्या कोणत्याहि वस्तूस कोणी शिवला तर त्यानें आपलीं वस्त्रें धुवावीं, पाण्यानें स्नान करावें आणि संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. २३ तिच्या बिछान्याला अथवा ज्या वस्तूवर ती बसली असेल तिला स्पर्श करणाऱ्यानें संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. २४ कोणी पुरुषानें तिजशीं संग केला व तिचें रक्त त्यास लागलें तर त्यानें सात दिवस अशुचि राहावें व ज्या बिछान्यावर तो निजेल तोहि अशुद्ध समजावा.

२५ जर कोणा स्त्रीचा ऋतुकाळापेक्षां अधिक दिवस रुधिरस्राव होत असला अथवा मुदतीच्या बाहेर

ती ऋतुमती राहिली तर तितके सर्व दिवस ती अशुचि समजावी. २६ ती ऋतुमती असेल तितके सगळे दिवस ती ज्या बिछान्यावर निजेल तो तिच्या विटाळाचा बिछाना समजावा; त्याप्रमाणेंच ती ज्या वस्तूवर बसेल ती तिच्या ऋतुकाळाच्या विटाळाप्रमाणें अशुद्ध समजावी. २७ जो कोणी त्या वस्तूंना स्पर्श करील तो अशुचि समजावा व त्यानें आपलीं वस्त्रें धुवावीं, पाण्यानें स्नान करावें आणि संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. २८ त्या स्त्रीनें आपल्या ऋतुस्रावापासून शुद्ध झाल्यावर आणखी पुढें सात दिवस गणावे; त्यानंतर ती शुद्ध ठरेल. २९ आठव्या दिवशीं तिनें दोन होले अथवा पारव्यांचीं दोन पिलें घेऊन दर्शनमंडपाच्या दारापाशीं याजकाकडे जावें. ३० मग याजकानें एकाचें पापार्पण व दुसऱ्याचें होमार्पण करावें आणि तिच्या विटाळाच्या अशुद्धतेमुळें तिच्यासाठीं परमेश्वरासमोर प्रायश्चित्त करावें.

३१ या प्रकारें तुम्ही इस्राएल लोकांस त्यांच्या अशुद्धतेपासून दूर ठेवा म्हणजे त्यांच्या ठायीं असलेलें माझें निवासस्थान ते भ्रष्ट करणार नाहींत, आणि आपल्या अशुद्धतेंत सांपडून मरावयाचे नाहींत.

३२ स्राव होऊन किंवा रेतपात होऊन जो पुरुष अशुद्ध होतो, ३३ अथवा जी स्त्री ऋतुमति होते आणि ज्या पुरुषास अथवा स्त्रीस स्राव होतो, आणि जो कोणी पुरुष रजस्वलेशीं संग करितो, त्यांच्यासंबंधाचा नियम हा.

१६ १ अहरोनाचे दोन पुत्र परमेश्वरासमीप गेल्यामुळें मृत्यु पावल्यावर परमेश्वरानें मोशाला सांगितलें तें हें : २ परमेश्वर मोशाला म्हणाला : तुझा भाऊ अहरोन यास सांग, कोशावर असलेल्या दयासनापुढें अंतरपटाच्या आंत असलेल्या पवित्रस्थानांत तूं भलत्या वेळीं जाऊं नये, गेलास तर मरशील, कारण दयासनावरील मेघांत मी दर्शन देत जाणार. ३ अहरोन पवित्रस्थानांत प्रवेश करील तेव्हां त्यानें पापार्पणासाठीं एक गोऱ्हा व होमार्पणासाठीं एक मेंढा घेऊन यावें. ४ त्यानें सणाच्या कापडाचा पवित्र अंगरखा घालावा; सणाच्या कापडाच्या चोळण्यानें आपलें अंग झाकावें; सणाच्या कमरबंदानें आपली कमर कसावी आणि सणाचा मंदील घालावा; हीं सर्व पवित्र वस्त्रें होत. त्यानें पाण्यानें स्नान करून हीं वस्त्रें परिधान करून यावें. ५ मग त्यानें इस्राएलाच्या मंडळीकडून पापार्पणासाठीं दोन बकरे व होमार्पणासाठीं एक मेंढा आणावा.

६ अहरोनानें आपल्यासाठीं आणिलेला पापार्पणाचा गोऱ्हा अर्पून स्वतांसाठीं व स्वतांच्या घराण्यासाठीं प्रायश्चित्त करावें. ७ मग त्यानें ते दोन बकरे घेऊन दर्शनमंडपाच्या दारापाशीं परमेश्वरासमोर ठेवावे. ८ अहरोनानें त्या दोन बकऱ्यांवर चिठ्या टाकाव्या; एक चिठी परमेश्वरासाठीं व दुसरी पाप वाहून नेण्यासाठीं. ९ ज्या बकऱ्यावर परमेश्वराच्या नांवाची चिठी निघेल तो अहरोनानें पापार्पणादाखल बळी द्यावा. १० ज्या बकऱ्यावर पाप वाहून नेण्यासंबंधाची चिठी निघेल त्यास परमेश्वरासमोर जीवंत उभें करावें व त्याच्याद्वारें प्रायश्चित्त व्हावें, आणि तो बकरा पाप वाहून नेण्यासाठीं रानांत सोडून द्यावा.

११ मग स्वतांसाठीं पापार्पण करावयाचा गोऱ्हा अहरोनानें जवळ आणावा आणि तो वधून आपल्यासाठीं व आपल्या घराण्यासाठीं प्रायश्चित्त करावें; १२ आणि परमेश्वरासमोर असलेल्या वेदीवरून जळते निखारे भरलेलें धुपाटणें घ्यावें आणि कुटून बारीक केलेला ओंजळभर सुगंधी धूप अंतरपटाच्या आंत आणावा; १३ तो धूप परमेश्वरासमोर अग्नीवर असा घालावा कीं त्याच्या धुरानें आज्ञापटावरल्या दयासनास व्यापून टाकावें, म्हणजे तो मरावयाचा नाहीं; १४ मग त्यानें गोऱ्ह्याचें कांहीं रक्त दयासनाच्या पूर्वेकडल्या बाजूस बोटानें शिंपडावें; व तें रक्त बोटानें त्या दयासनासमोर सात वेळां शिंपडावें.

१५ मग त्यानें लोकांसाठीं आणिलेला पापार्पणाचा बकरा वधावा; त्याचें रक्त अंतरपटाच्या आंत घेऊन जावें आणि जसें त्यानें गोऱ्ह्याच्या रक्ताचें करावयाचें तसेंच बकऱ्याच्या रक्ताचें करावें, म्हणजे अर्थात् तें दयासनावर

व दयासनाच्या पुढें शिंपडावें. १६ आणखी त्यानें
इस्राएल लोकांची अशुद्धता व अपराध यांबद्दल म्हणजे
अर्थात् त्यांच्या एकंदर पातकांबद्दल पवित्रस्थानासाठीं
प्रायश्चित्त करावें; लोकांच्या अशुद्धतेनें व्याप्त होऊन
त्यांच्यामध्यें वसत असलेल्या दर्शनमंडपासाठीं तसेंच
करावें. १७ अहरोन प्रायश्चित्त करण्यासाठीं पवित्रस्थानांत
प्रवेश करील तेव्हांपासून तो आपल्यासाठीं, आपल्या
घराण्यासाठीं आणि इस्राएलाच्या सर्व मंडळीसाठीं
प्रायश्चित्त करून बाहेर येईपर्यंत त्या दर्शनमंडपांत अन्य
कोणीहि मनुष्य नसावा. १८ मग त्यानें तेथून निघून
परमेश्वराच्या समोरल्या वेदीपाशीं जाऊन तिच्यासाठीं
प्रायश्चित्त करावें; गोऱ्ह्याचें आणि बकऱ्याचें कांहीं रक्त
घेऊन त्या वेदीच्या चारी बाजूंच्या शृंगांस लावावें,
१९ आणि कांहीं रक्त घेऊन आपल्या बोटानें सात वेळां
तिजवर शिंपडून ती इस्राएलाच्या अशुद्धतेपासून मुक्त
करून शुद्ध व पवित्र करावी.

२० मग पवित्रस्थान, दर्शनमंडप आणि वेदी यांच्या-
साठीं प्रायश्चित्त करण्याचें संपविल्यावर तो जीवंत बकरा
जवळ आणावा. २१ अहरोनानें आपले दोन्ही हात त्या
जीवंत बकऱ्याच्या मस्तकावर ठेवून इस्राएल लोकांचीं
सर्व दुष्कर्में व अपराध यांचा म्हणजे अर्थात् त्यांच्या सर्व
पातकांचा अंगीकार करावा; व तीं सर्व त्या बकऱ्याच्या
शिरीं ठेवून त्यास नेमिलेल्या मनुष्याच्या हातानें रानांत
पाठवून द्यावें. २२ तो बकरा *त्यांच्या* सर्व दुष्कर्मांचा
भार आपल्यावर घेऊन निर्जन प्रदेशांत जाईल; त्या
मनुष्यानें त्या बकऱ्यास रानांत सोडून द्यावें.

२३ मग अहरोनानें दर्शनमंडपांत येऊन पवित्र-
स्थानांत प्रवेश करण्यापूर्वी परिधान केलेलीं सणाचीं
वस्त्रें उतरून तेथें ठेवावीं. २४ मग त्यानें एकाद्या पवित्र
स्थळीं पाण्यानें स्नान करावें व आपलीं वस्त्रें घालून
बाहेर जाऊन स्वतांसाठीं व लोकांसाठीं होमार्पण करून
स्वतांसाठीं व लोकांसाठीं प्रायश्चित्त करावें. २५ पापार्प-
णाच्या वपेचा त्यानें वेदीवर होम करावा. २६ पाप
वाहून नेण्यासंबंधाचा बकरा ज्या मनुष्यानें सोडून दिला
असेल त्यानें आपलीं वस्त्रें धुवावीं, पाण्यानें स्नान करावें
व मग छावणींत यावें. २७ पापार्पणाच्या ज्या गोऱ्ह्याचें
व पापार्पणाच्या ज्या बकऱ्याचें रक्त पवित्र-स्थानांत
प्रायश्चित्त करण्यासाठीं नेण्यांत येईल, ते दोन्ही तळाबाहेर
न्यावे आणि त्यांचें कातडें, मांस व शेण हीं अग्नींत
जाळून टाकावीं. २८ तीं जाळून टाकणाऱ्यानें आपलीं
वस्त्रें धुवावीं, पाण्यानें स्नान करावें व मग छावणींत यावें.

२९ तुम्हांस निरंतरचा असा हा एक विधि असावा:
सातव्या महिन्याच्या दशमीस तुम्हीं आपल्या
जिवास क्लेश द्यावा; त्या दिवशीं कोणींहि काम करूं
नये, मग ते स्वदेशीय असोत किंवा तुमच्यांत वस्ती
करून राहिलेले कोणी परदेशीय असोत; ३० कारण त्या
दिवशीं तुम्हांस शुद्ध करावें म्हणून तुमच्यासाठीं
प्रायश्चित्त करण्यांत येईल; परमेश्वरासमोर तुम्ही
आपल्या सर्व पातकांपासून शुद्ध ठराल. ३१ तुम्हांस
हा परम विश्रामाचा शब्बाथ होय; या दिवशीं तुम्हीं
आपल्या जिवास क्लेश द्यावा; हा निरंतरचा विधि होय.
३२ ज्याला आपल्या पित्याच्या जागीं याजक होण्यासाठीं
अभिषेक व संस्कार होईल त्यानें प्रायश्चित्त करावें;
म्हणजे सणाचीं पवित्र वस्त्रें लेऊन ३३ पवित्रस्थान,
दर्शनमंडप व वेदी यांच्यासाठीं त्यानें प्रायश्चित्त करावें
आणि याजक व मंडळींतले इतर सर्व लोक यांच्यासाठींहि
प्रायश्चित्त करावें. ३४ इस्राएल लोकांसाठीं वर्षांतून
एकदा त्यांच्या सर्व पातकांचें प्रायश्चित्त करण्यांत यावें,
म्हणून हा तुम्हांस निरंतरचा विधि होय. परमेश्वरानें
मोशाला आज्ञा दिली त्याप्रमाणें अहरोनानें केलें.

१ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ अहरोन,
१७ त्याचे पुत्र आणि सर्व इस्राएल लोक यांस सांग
कीं परमेश्वरानें अशी आज्ञा दिली आहे:
३ इस्राएल घराण्यापैकीं कोणी बैल, कोकरूं अथवा
बकरा छावणीच्या आंत अथवा बाहेर मारील, ४ दर्शन-
मंडपाच्या दाराशीं परमेश्वराच्या निवासमंडपासमोर
परमेश्वराला अर्पण करावयास तो आणणार नाहीं, तर त्या
मनुष्यास हत्या केल्याचा दोष लागेल; त्यानें रक्तपात
केला म्हणून त्याचा स्वजनांतून उच्छेद व्हावा; ५ याचा
हेतु असा कीं इस्राएल लोक आपले यज्ञपशु खुल्या

मैदानांत मारीत असत, ते त्यांनीं दर्शनमंडपाच्या
दाराशीं याजकाकडे परमेश्वरासमोर आणून परमे-
श्वराप्रीत्यर्थ शांत्यर्पण म्हणून अर्पावे. ६ याजकानें त्यांचें
रक्त दर्शनमंडपाच्या दाराशीं परमेश्वराच्या वेदीवर
शिंपडावें आणि त्यांच्या वपेचा परमेश्वराला सुवासिक
हव्य म्हणून होम करावा. ७ जे व्यभिचारी मतीनें बोकड-
देवांच्या मागें लागून त्यांस आपले यज्ञपशु अर्पितात
त्यांनीं यापुढें त्यांस यज्ञ करूं नयेत; हा तुम्हांस
पिढ्यानपिढ्या निरंतरचा विधि समजावा.

८ तूं *त्यांस सांग कीं* इस्राएल घराण्यांपैकीं, अथवा
त्यांत राहणाऱ्या उपरी लोकांपैकीं कोणी होमार्पण
अथवा शांत्यर्पण करील, ९ आणि तें दर्शन-
मंडपाच्या दाराशीं परमेश्वराला अर्पिण्यासाठीं आणणार
नाहीं, तर त्याचा स्वजनांतून उच्छेद करण्यांत यावा.

१० इस्राएल लोकांपैकीं अथवा त्यांच्यांत राहणाऱ्या
उपरी लोकांपैकीं कोणीं कोणत्याहि प्रकारचें रक्त सेवन
केलें तर त्या मनुष्याला मी विमुख होऊन त्याचा स्वजनां-
तून उच्छेद करीन. ११ कारण शरीराचें जीवन रक्तांत
असतें, आणि तुमच्या जिवाबद्दल प्रायश्चित्त व्हावें
म्हणून तें तुम्हांस वेदीवर दिलें आहे; कारण जिवा-
बद्दल प्रायश्चित्त रक्तानेंच होतें. १२ ह्याकरितां मीं
इस्राएल लोकांस आज्ञा केली आहे कीं तुमच्यांतील
कोणीं रक्ताचें सेवन करूं नये; तुमच्यांत राहणाऱ्या
उपऱ्यांनींहि करूं नये.

१३ यास्तव इस्राएल लोकांपैकीं कोणीं अथवा
त्यांच्यामध्यें राहणाऱ्या उपऱ्यांपैकीं कोणीं खाण्यालायक
पशूची अगर पक्ष्याची शिकार केली तर त्यानें त्याचें
रक्त काढून तें मातीनें झांकावें. १४ कारण प्राणिमात्रांच्या
जीवनाविषयीं म्हणाल तर त्यांचें रक्त हेंच त्यांचें
जीवन होय; यास्तव इस्राएल लोकांस मीं आज्ञा दिली आहे
कीं कोणत्याहि प्राण्याचें रक्त सेवन करूं नये. कारण
सर्व प्राण्यांचें जीवन हेंच रक्त होय; तें जो कोणी
सेवन करील त्याचा उच्छेद व्हावा. १५ कोणीहि
मनुष्य, मग तो स्वदेशीय असो अथवा परदेशीय असो,
आपोआप मेलेल्या अथवा फाडून मारिलेल्या पशूचें
मांस खाईल तर त्यानें आपलीं वस्त्रें धुऊन पाण्यानें
स्नान करावें व संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें म्हणजे
तो शुद्ध होईल. १६ त्यानें आपलीं वस्त्रें धुतलीं
नाहींत व स्नान केलें नाहीं तर त्याच्या दुष्कर्माचें
त्याला फळ मिळेल.

१८ १ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्राएल
लोकांस सांग कीं मी परमेश्वर तुमचा देव आहें.
३ तुम्ही मिसर देशांत राहत होतां तेथल्या
चालीरितींचें अनुकरण करूं नका; तसेंच ज्या कनान
देशांत मी तुम्हांस घेऊन जात आहें, तेथल्या चाली-
रितींचें अनुकरण करूं नका व तेथल्या विधींप्रमाणें
चालूं नका. ४ माझेच नियम पाळा, आणि माझेच
विधि मान्य करून त्यांप्रमाणें वागा; मी तुमचा देव
परमेश्वर आहें. ५ तुम्हीं माझे विधि व माझे नियम
पाळावे; ते जो पाळील तो त्यांच्यायोगें जीवंत राहील;
मी परमेश्वर आहें.

६ तुम्हांपैकीं कोणीं आपल्या जवळच्या आप्ताची
काया उघडी करावयास त्याजपाशीं जाऊं नये; मी
परमेश्वर आहें. ७ तूं आपल्या पित्याची काया म्हणजे
अर्थात् आपल्या मातेची काया उघडी करूं नको. ती
तुझी माता आहे म्हणून तूं तिची काया उघडी करूं नको.
८ आपल्या सावत्र आईची कायाहि उघडी करूं नको;
ती *तुझ्या पित्याचीच काया आहे.* ९ आपली बहीण
मग ती सख्खी असो अगर सावत्र असो; ती घरीं
जन्मलेली असो किंवा बाहेर जन्मलेली असो, तिची
काया उघडी करूं नको. १० आपली नात, मग ती
मुलाची कन्या असो अगर मुलीची कन्या असो, तिची
काया उघडी करूं नको; तिची काया ती तुझीच आहे.
११ पित्याला झालेली तुझ्या पित्याच्या बायकोची
कन्या ती तुझी बहीणच आहे म्हणून तिची काया
उघडी करूं नको. १२ आपल्या आतेची काया उघडी
करूं नको. ती तुझ्या पित्याची जवळची आप्त आहे.
१३ आपल्या मावशीची काया उघडी करूं नको;
कारण ती तुझ्या मातेची जवळची आप्त आहे.
१४ आपल्या चुलत्याची काया उघडी करूं नको, म्हणजे

अर्थात् त्याच्या स्त्रीशीं गमन करूं नको; ती तुझी चुलती
होय. १५ आपल्या सुनेची काया उघडी करूं नको;
ती तुझ्या मुलाची बायको होय; म्हणून तिची काया
उघडी करूं नको. १६ आपल्या भावजयीची काया
उघडी करूं नको; ती तुझ्या भावाचीच काया होय.
१७ कोणा स्त्रीची आणि तिच्या कन्येची अशा दोघींचीहि
काया उघडी करूं नको; तिची नात मग ती तिच्या
मुलाची कन्या असो अथवा कन्येची कन्या असो,
तिला आपली स्त्री करून तिची काया उघडी करूं नको;
त्या जवळच्या आप्त होत; असें करणें मोठें पातक होय.
१८ तूं आपल्या स्त्रीच्या बहिणीस आपली स्त्री करून
तिला सवत करूं नको; ती जीवंत असतां तिच्या
बहिणीची काया उघडी करूं नको.

१९ स्त्री ऋतुमती झाल्यानें अशुचि असते तोंवर
तिची काया उघडी करण्यासाठीं तिच्यापाशीं जाऊं नको.
२० तूं आपल्या शेजाऱ्याच्या स्त्रीशीं कुकर्म करून अशुद्ध
होऊं नको. २१ आपल्या संतानापैकीं कोणाचा मोलखो-[1]
प्रीत्यर्थ अग्नींत होम करूं नको; तुझा देव परमेश्वर याच्या
पवित्र नामास बट्टा लावूं नको; मी परमेश्वर आहें. २२
स्त्रीगमनाच्या रीतीप्रमाणें पुरुषगमन करूं नको. हें अमं-
गळ कृत्य होय. २३ कोणत्याहि पशूशीं गमन करून
अशुद्ध होऊं नको; स्त्रीनें पशूशीं कुकर्म करावयास त्याच्या-
समोर उभें राहूं नये; हें विपरीत कर्म होय.

२४ असल्या प्रकारचें कोणतेंहि कर्म करून भ्रष्ट
होऊं नका; कारण जीं राष्ट्रें मी तुम्हांसमोरून घालवणार
आहें तीं असल्याच सर्व कर्मांनीं भ्रष्ट झालीं आहेत;
२५ त्यांचा देशहि भ्रष्ट झाला आहे, म्हणून त्यांच्या
अधर्माबद्दल त्यांचा मी समाचार घेत आहें व तो देश
आपल्या रहिवाशांस ओकून टाकीत आहे. २६ ह्या-
करितां तुम्हीं माझे विधि व नियम पाळावे आणि स्वदेशीय
अथवा तुमच्यांतले विदेशीय उपरी यांपैकीं कोणींहि
असलें अमंगळ कर्म करूं नये; २७ कारण तुमच्यापूर्वी
या देशांत राहणाऱ्या लोकांनीं असलीं सर्व अमंगळ कर्में
केल्यामुळें हा देश भ्रष्ट झाला आहे. २८ तुमच्या-
पूर्वी जे लोक या देशांत राहत होते त्यांस जसें या
देशानें ओकून टाकिलें, तसें तुम्हीं देश भ्रष्ट केल्यास
तुम्हांसहि त्यानें ओकून टाकूं नये. २९ जे कोणी
असलें अमंगळ कर्म करितील त्या सर्वांचा स्वजनांतून
उच्छेद व्हावा. ३० ही जी आज्ञा मीं तुम्हांस दिली
आहे ती तुम्हीं पाळावी; तुमच्यापूर्वी प्रचलित अस-
लेल्या अमंगळ रिवाजांप्रमाणें तुम्हीं चालूं नये व त्यामुळें
भ्रष्ट होऊं नये; मी परमेश्वर तुमचा देव आहें.

१ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्रा-
१९ एलाच्या सर्व मंडळीस सांग: तुम्हीं पवित्र
असावें, कारण मी परमेश्वर तुमचा देव पवित्र
आहें. ३ तुम्हीं आपली आई व आपला बाप यांचें
भय बाळगावें आणि माझे शब्बाथ पाळावे; मी
परमेश्वर तुमचा देव आहें. ४ तुम्हीं मूर्तींकडे वळूं
नये आणि आपल्यासाठीं ओतींव देव करूं नयेत; मी
परमेश्वर तुमचा देव आहें.

५ तुम्हीं परमेश्वराप्रीत्यर्थ शांत्यर्पणाचा यज्ञ कराल
तेव्हां मी तुम्हांस प्रसन्न होईन असा तो करा ६ त्या
अर्पणाचें मांस यज्ञाच्या दिवशीं व दुसऱ्या दिवशीं खावें,
पण तिसऱ्या दिवशीं कांहीं शेष राहिल्यास तें अग्नीनें
जाळून टाकावें. ७ तिसऱ्या दिवशीं तें खाणें अमंगळ
होय; तें मान्य व्हावयाचें नाहीं. ८ जो कोणी त्यांतलें
कांहीं खाईल त्याला त्याच्या दुष्कर्मांचें फळ मिळेल,
कारण त्यानें परमेश्वराची पवित्र वस्तु भ्रष्ट केली असें
होईल; त्या मनुष्याचा स्वजनांतून उच्छेद व्हावा.

९ तुम्हीं आपल्या देशांतल्या पिकाची कापणी
कराल तेव्हां तूं आपल्या शेताच्या कानाकोपऱ्यांतलें
पीक झाडून सारें कापूं नको आणि पीक काढून
घेतल्यावर त्यांतला सरवा वेचूं नको. १० आपला
द्राक्षमळाहि झाडून सारा खुडूं नको. तसेंच द्राक्ष-
मळ्यांतील पडझड गोळा करूं नको; गरीब व उपरी
यांच्यासाठीं ती राहूं द्यावी; मी परमेश्वर तुमचा देव आहें.

११ तुम्हीं चोरी करूं नये, एकमेकांशीं कपट
करूं नये व खोटें बोलूं नये. १२ माझ्या नामाची
खोटी शपथ वाहून आपल्या देवाच्या नामाला बट्टा

१ विदेशी लोकांचें एक दैवत.

लावूं नये; मी परमेश्वर आहें. १३ आपल्या शेजाऱ्या-
वर जुलूम करूं नको व त्याला लुटूं नको; मजुराची
मजुरी रात्रभर आपल्याजवळ ठेवूं नको. १४ बहि-
ऱ्यास शिव्याशाप देऊं नको; ठोकर लागेल अशी वस्तु
अंधळ्यापुढें ठेवूं नको; तूं आपल्या देवाचें भय धर;
मी परमेश्वर आहें. १५ न्याय करितांना गैरइनसाफ
करूं नको; दरिद्याच्या दारिद्यावर नजर देऊं नको,
अथवा समर्थाचें तोंड पाहून निकाल देऊं नको; तर
आपल्या शेजाऱ्याचा न्याय धर्मानें कर. १६ आपल्या
लोकांत इकडेतिकडे चहाड्या करीत फिरूं नको;
आपल्या शेजाऱ्याच्या जिवावर उठूं नको; मी परमेश्वर
आहें. १७ आपल्या मनांतहि आपल्या भावाचा द्वेष
करूं नको; आपल्या शेजाऱ्याचा निषेध अवश्य करावा,
न केला तर त्याच्यामुळें तुझ्या माथीं पाप येईल.
१८ सूड उगवूं नको; आपल्या भाऊबंदांपैकीं कोणाचा
दावा धरूं नको, तर तूं आपल्या शेजाऱ्यावर स्वतां-
प्रमाणें प्रेम ठेव; मी परमेश्वर आहें.

१९ माझे विधि पाळ. आपल्या पशूंचा भिन्न
जातींच्या पशूंशीं संग होऊं देऊं नको; आपल्या शेतांत
दोन जातींचें बीं मिसळून पेरूं नको; दोन प्रकारचें सूत
मिसळून विणिलेलें कापड अंगावर घेऊं नको. २० जी
स्त्री दासी असून एकाद्या पुरुषाशीं वाग्दत्त झाली असेल,
पण खंड भरून मुक्त झाली नसेल, तिच्याशीं कोणीं
कुकर्म केलें तर त्या दोघांस शिक्षा व्हावी; तथापि तिची
मुक्तता झाली नसल्यामुळें त्यांस देहांत शासन होऊं नये.
२१ त्या पुरुषानें दर्शनमंडपाच्या दाराशीं परमेश्वरासमोर
दोषार्पणासाठीं एक मेंढा आणावा; २२ आणि त्यानें
केलेल्या पापाबद्दल दोषार्पणाच्या मेंढ्याच्याद्वारें त्याच्या-
साठीं याजकानें परमेश्वरासमोर प्रायश्चित्त करावें, म्हणजे
त्यानें केलेल्या पापाची त्याला क्षमा होईल.

२३ तुम्हीं त्या देशांत जाऊन पोहंचल्यावर खाण्या-
साठीं हरतऱ्हेचीं फळझाडें लावाल तेव्हां तीन वर्षेपर्यंत
त्यांचीं फळें निषिद्ध[१] समजावीं, तीं खाऊं नयेत. २४ चौथ्या
वर्षीं त्यांचीं सर्व फळें परमेश्वराच्या उपकारस्मरणाप्रीत्यर्थ
पवित्र समजावीं. २५ मग पांचव्या वर्षीं तुम्हीं त्यांचीं
फळें खावीं म्हणजे त्यांपासून तुम्हांस विपुल फळें
मिळतील; मी परमेश्वर तुमचा देव आहें. २६ तुम्ही
कोणतेंहि मांस रक्तासह खाऊं नका; तुम्ही कांहीं मंत्र-
तंत्र करूं नका व शकुनमुहूर्त पाहूं नका. २७ आपल्या
डोक्याला घेरा राखूं नका; आपल्या दाढीचे कोपरे
छाटून बेरूप करूं नका. २८ कोणी मयत झाल्यामुळें
आपल्या अंगावर घाय करूं नका, आपलें अंग गोंदूं
नका; मी परमेश्वर आहें.

२९ आपल्या कन्येस भ्रष्ट करवून वेश्या होऊं देऊं
नका; वेश्यागमनामुळें देश महापातकानें व्यापून जाईल
असें करूं नका. ३० माझे शब्बाथ पाळा आणि माझ्या
पवित्रस्थानाविषयीं पूज्यबुद्धि बाळगा; मी परमेश्वर आहें.
३१ पंचाक्षऱ्यांच्या किंवा चेटक्यांच्या नादीं लागूं नका;
त्यांच्या पाठीस लागून भ्रष्ट होऊं नका; मी परमेश्वर
तुमचा देव आहें. ३२ पिकलेल्या केसांसमोर उठून उभे
राहा; वृद्धास मान द्या; आपल्या देवाचें भय बाळगा; मीं
परमेश्वर आहें. ३३ कोणी विदेशी तुमच्या देशांत
तुमच्याबरोबर राहत असला तर त्यास उपद्रव देऊं नका.
३४ तुमच्याबरोबर राहणाऱ्या परदेशीय मनुष्यास तुम्ही
स्वदेशीय मनुष्यासारखेंच लेखा; आणि त्याजवर आपल्या-
सारखीच प्रीति करा; कारण तुम्हीहि मिसर देशांत पर-
देशीय होतां; मी परमेश्वर तुमचा देव आहें.

३५ न्याय करण्यांत, मोजणी करण्यांत, तोलण्यांत
अथवा मापण्यांत कांहीं अधर्म करूं नका. ३६ खरा
तागडी, खरीं वजनें, खरा एफा व खरा हिन हीं तुमच्या-
पाशीं असावीं; ज्यानें तुम्हांस मिसर देशांतून बाहेर
आणिलें तो मी परमेश्वर तुमचा देव आहें; ३७ म्हणून
तुम्ही माझे सर्व विधि आणि सर्व नियम मान्य करून
पाळावे; मी परमेश्वर आहें.

२० १ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्राएल
लोकांस तूं आणखी असें सांग: इस्राएल
लोकांपैकीं अथवा इस्राएल लोकांत राहणाऱ्या
उपऱ्यांपैकीं कोणीं आपलें अपत्य मोलखास अर्पिलें
तर त्यास अवश्य जिवें मारावें; देशाच्या लोकांनीं

[१] मुळांत : बेसुनत

त्यास दगडमार करावा. ३ मी त्याला विमुख होऊन
त्याचा स्वजनांतून उच्छेद करीन; कारण त्यानें आपलें
अपत्य मोलखास देऊन माझें पवित्रस्थान भ्रष्ट केलें आहे
आणि माझ्या पवित्र नामास बट्टा लावला आहे. ४ मोल-
खाला आपलें अपत्य अर्पिणाऱ्याकडे देशचे लोक
डोळेझाक करून त्यास जिवें मारणार नाहींत. ५ तर
मी त्या मनुष्याला व त्याच्या कुटुंबाला विमुख होऊन
त्याचा व जे कोणी त्यास अनुसरून व्यभिचारी
मतीनें मोलखाची कास धरितील, त्या सर्वांचा
स्वजनांतून उच्छेद करीन.

६ जो माणूस व्यभिचारी मतीनें पंचाक्षरी व चेटकी
यांच्या नादीं लागतो त्याला मी विमुख होऊन त्याचा
स्वजनांतून उच्छेद करीन; ७ म्हणून तुम्हीं स्वतांस पावन
करून पवित्र व्हा; कारण मी परमेश्वर तुमचा देव आहें.
८ तुम्हीं माझे विधि मान्य करून पाळा; तुम्हांस पावन
करणारा मीच परमेश्वर आहें. ९ आपल्या पित्यास अथवा
मातेस जो शिव्याशाप देईल त्यास अवश्य जिवें मारावें;
जो आपल्या पित्यास अथवा मातेस शिव्याशाप देईल
त्याचा रक्तपात त्याच्याच माथीं राहील.

१० कोणी परस्त्रीगमन करील तर आपल्या शेजा-
ऱ्याच्या स्त्रीशीं व्यभिचार करणारा तो जार व ती जारिणी
या दोघांसहि अवश्य जिवें मारावें. ११ जो आपल्या
पित्याच्या स्त्रीशीं गमन करतो तो आपल्या पित्याची
काया उघडी करितो; त्या दोघांसहि अवश्य जिवें
मारावें; त्यांचा रक्तपात त्यांच्याच माथीं राहील.
१२ कोणीं आपल्या सुनेशीं गमन केलें तर त्या दोघां-
सहि अवश्य जिवें मारावें; त्यांचें तें कर्म विपरीत
होय; त्यांचा रक्तपात त्यांच्याच माथीं राहील.
१३ कोणीं स्त्रीगमनाप्रमाणें पुरुषगमन केलें तर त्या
दोघांचें हें अमंगळ कृत्य होय; त्यांस अवश्य जिवें
मारावें; त्यांचा रक्तपात त्यांच्याच माथीं राहील.
१४ एखादी स्त्री व तिची आई या दोघींस कोणीं
ठेविलें तर तें महापाप होय; तो पुरुष व त्या
दोन्ही स्त्रिया यांस अग्नींत जाळावें; तुमच्यामध्यें
असलें दुष्कर्म राहूं नये. १५ कोणा पुरुषानें पशुगमन
केलें तर त्याला अवश्य जिवें मारावें; तो पशुहि मारून
टाकावा. १६ कोणी स्त्री कुकर्म करावयास एखाद्या
पशूकडे जाईल तर त्या स्त्रीला व त्या पशूला मारून
टाकावें; त्यांचा अवश्य वध करावा; त्यांचा रक्तपात
त्यांच्याच माथीं राहील.

१७ कोणी आपल्या बहिणीला, मग ती त्याच्या
पित्याची कन्या असो अगर त्याच्या मातेची कन्या असो,
आपली स्त्री करून तो तिची काया पाहील व ती त्याची
काया पाहील तर हा निंद्य प्रकार होय; त्या दोघांचा
त्यांच्या भाऊबंदांच्या देखत उच्छेद करावा. त्यानें आपल्या
बहिणीची काया उघडी केली असें होईल; त्यानें आपल्या
दुष्कर्माचा भार वाहिला पाहिजे. १८ स्त्री ऋतुमती असतां
तिच्याशीं कोणी गमन करील व तिची काया उघडी
करील तर त्यानें तिच्या रक्ताचा झरा उघडा केला व
तिनेंहि आपल्या रक्ताचा झरा उघडा केला असें होईल; त्या
दोघांचाहि स्वजनांतून उच्छेद व्हावा. १९ आपली
मावशी अथवा आपली आत यांची काया उघडी करूं
नये; जो तसें करील त्यानें आपल्या जवळच्या आप्ताची
काया उघडी केली असें होईल; त्यांनीं आपल्या दुष्कर्माचा
भार वाहिला पाहिजे. २० कोणी आपल्या चुलतीशीं
गमन केलें तर त्यानें आपल्या चुलत्याचीच काया उघडी
केली असें होईल; तीं आपल्या पापाचा भार वाहून
निरपत्य मरतील. २१ कोणी आपल्या भावजयीस
ठेवील तर ती भ्रष्टता होय; तशानें त्यानें आपल्या
भावाचीच काया उघडी केली असें होईल; तीं
निरपत्य राहणार.

२२ याकरितां तुम्हीं माझे सर्व विधि व माझे सर्व
नियम मान्य करून पाळावे म्हणजे ज्या देशीं मी
तुम्हांस घेऊन जात आहें तो तुम्हांस ओकून
टाकणार नाहीं. २३ ज्या राष्ट्रांस मी तुम्हांपुढून
घालवून देणार आहें त्यांच्या चालीरितींचें तुम्हीं अनु-
करण करूं नका; त्यांनीं असला भ्रष्टाचार केला म्हणून
मला त्यांचा तिटकारा आला; २४ पण मीं तुम्हांस
सांगितलें आहे कीं त्यांचा देश तुमचें वतन होईल,
मी तो तुमच्या स्वाधीन करीन, ज्यांत दुधामधाचे प्रवाह

वाहत आहेत असा देश तुमच्या ताब्यांत देईन; तुम्हांस इतर राष्ट्रांपासून वेगळें करणारा मी परमेश्वर तुमचा देव आहें. २५ यास्तव तुम्हीं शुद्ध व अशुद्ध पशु आणि शुद्ध व अशुद्ध पक्षी यांमधला भेद पाळावा, आणि जो कोणताहि पशु, पक्षी अथवा जमिनीवर रांगणारा प्राणी मीं तुम्हांसाठीं अशुद्ध ठरवून निषेधिला आहे, त्याच्या योगें तुम्हीं आपणांस अमंगळ करूं नका. २६ तुम्हीं माझ्याप्रीत्यर्थ पवित्र व्हावें; कारण मी परमेश्वर पवित्र आहें; तुम्हीं माझेच असावें म्हणून मीं तुम्हांस इतर राष्ट्रांपासून वेगळें केलें आहे.

२७ कोणी पंचाक्षरी अथवा चेटकी असला, मग तो पुरुष असो किंवा स्त्री असो, त्यास अवश्य जिवें मारावें. त्यांस दगडमार करावा; त्यांचा रक्तपात त्यांच्या माथीं राहील.

२१ १ परमेश्वर मोशाला म्हणाला, अहरोनाचे पुत्र जे याजक त्यांस असें सांग: त्यांच्या कुळापैकीं कोणी मयत झालें तर त्यांचें कोणीहि सुतक धरूं नये; २ आपले जवळचे आप्त म्हणजे आपली माता, पिता, पुत्र, कन्या, बंधु ३ आणि आपल्याजवळ असलेली अविवाहित भगिनी यांचें मात्र सुतक धरावें; ४ पण याजक आपल्या लोकांमध्यें प्रमुख असल्यामुळें त्यानें सुतक धरून स्वतांला अपवित्र करूं नये. ५ त्यांनीं आपलें डोकें मुंडूं नये; आपल्या दाढीच्या कोनांचे केस काढूं नयेत; आपल्या शरीरास घाय करूं नयेत. ६ त्यांनीं आपल्या देवाप्रीत्यर्थ पवित्र राहावें आणि आपल्या देवाचें नाम अपवित्र करूं नये; कारण ते परमेश्वराप्रीत्यर्थ हव्य म्हणजे देवाप्रीत्यर्थ अन्न अर्पीत असतात; म्हणून त्यांनीं पवित्र राहावें. ७ त्यांनीं वेश्या किंवा भ्रष्ट स्त्री आपली बायको करूं नये. सोडलेल्या स्त्रीशीं लग्न करूं नये. कारण याजक आपल्या देवाप्रीत्यर्थ पवित्र आहे. ८ याकरितां तूं त्यास पवित्र मानावें; तो तुझ्या देवास अन्न अर्पितो म्हणून त्यास तूं पवित्र लेखावें; कारण तुम्हांस पावन करणारा मी परमेश्वर पवित्र आहें. ९ कोणा याजकाची कन्या वेश्याकर्म करून भ्रष्ट झाली तर तिनें आपल्या पित्यासहि भ्रष्ट केलें असें होईल; तिला अग्नीनें जाळून टाकावें.

१० जो आपल्या बांधवांमध्यें मुख्य याजक आहे, ज्याच्या मस्तकावर अभिषेकाच्या तेलानें अभ्यंग झाला आहे, पवित्र वस्त्रें धारण करण्यास ज्याचा संस्कार झाला आहे, त्यानें आपल्या डोक्याचे केस सोडूं नयेत; आपलीं वस्त्रें फाडूं नयेत; ११ त्यानें कोणाच्या प्रेताजवळ जाऊं नये; आपल्या बापाचें किंवा मातेचें सुतक धरूं नये; १२ त्यानें पवित्रस्थानाबाहेर जाऊं नये; आपल्या देवाचें पवित्रस्थान भ्रष्ट करूं नये; कारण त्याच्या देवाच्या तैलाभिषेकानें त्याचा संस्कार झाला आहे; मी परमेश्वर आहें. १३ त्यानें कुमारीशींच विवाह करावा. १४ विधवा, सोडलेली स्त्री, भ्रष्ट स्त्री अथवा वेश्या यांपैकीं कोणी त्यानें बायको करूं नये. तर त्यानें आपल्या भाऊबंदांतल्या एखाद्या कुमारीशीं लग्न करावें. १५ त्यानें स्वजनांमध्यें आपली संतति भ्रष्ट होऊं देऊं नये; कारण त्याला पावन करणारा मी परमेश्वर आहें.

१६ आणखी परमेश्वर मोशाला म्हणाला, १७ अहरोनास सांग: तुझ्या वंशांत पिढ्यानपिढ्या ज्या कोणास कांहीं व्यंग असेल त्यानें देवास अन्न अर्पिण्यासाठीं जवळ जाऊं नये. १८ त्यास कोणतेंहि व्यंग असलें तर त्यानें समीप येऊं नये; मग तो अंधळा, लंगडा, चपट्या नाकाचा, अधिक अंग असलेला असो, १९ अथवा हातपाय तुटलेला असो, २० कुबडा, खुजा, नेत्रदोषी असो, किंवा चाई, गजकर्ण वगैरे झालेला अथवा भमांड असो; २१ अहरोन याजकाच्या वंशापैकीं कोणास असें एखादें व्यंग असलें तर त्यानें परमेश्वराला हव्य अर्पिण्यासाठीं जवळ जाऊं नये; त्याच्या शरीरांत व्यंग असल्यामुळें त्यानें आपल्या देवास अन्न अर्पावयास समीप येऊं नये. २२ त्यानें आपल्या देवास अर्पिलेलें परमपवित्र अन्न व पवित्र अन्न खावें; २३ पण त्याला व्यंग असल्यामुळें त्यानें अंतरपटाच्या आंत आणि वेदीपाशीं जाऊं नये; त्यानें माझीं पवित्रस्थानें भ्रष्ट करूं नयेत; कारण त्यांस पावन

करणारा मी परमेश्वर आहें. २४ मोशानें अहरोन, त्याचे पुत्र व सगळे इस्राएल लोक यांस हें सांगितलें.

२२ १ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ अहरोन व त्याचे पुत्र यांस सांग कीं इस्राएल लोकांच्या ज्या पवित्र वस्तु ते मला समर्पितात त्यासंबंधानें त्यांनीं जपावें आणि माझें पवित्र नाम भ्रष्ट करूं नये; मी परमेश्वर आहें. ३ तूं त्यांस सांग, पिढ्यानपिढ्या तुमच्या सर्व वंशांत जो कोणी अशुद्धावस्थेंत असून इस्राएल लोकांनीं परमेश्वराला समर्पित केलेल्या पवित्र वस्तूंस स्पर्श करील त्याचा माझ्यासमोर उच्छेद व्हावा; मी परमेश्वर आहें. ४ अहरोनाच्या वंशांपैकीं कोणी महारोगी अथवा स्रावी असला तर त्यानें शुद्ध होईपर्यंत पवित्र केलेल्या वस्तु खाऊं नयेत. मयतामुळें अशुद्ध झालेल्या मनुष्यास किंवा रेतस्खलन झालेल्या पुरुषास जो स्पर्श करील, ५ ज्याच्या स्पर्शानें लोक अशुद्ध होतात अशा रांगणाऱ्या जंतूला अथवा कोणत्याहि प्रकारची अशुद्धता असलेल्या एखाद्या मनुष्यास जो स्पर्श करील, ६ जो मनुष्य यांपैकीं कोणासहि स्पर्श करील, त्यानें संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें व जलस्नान करीपर्यंत पवित्र पदार्थ खाऊं नयेत. ७ सूर्यास्त झाल्यावर तो शुद्ध ठरेल, त्यानें नंतर पवित्र पदार्थ सेवन करावे, कारण तें त्याचें अन्नच होत. ८ आपोआप मेलेलें अथवा श्वापदांनीं फाडिलेलें असें कांहीं खाऊन त्यानें भ्रष्ट होऊं नये; मी परमेश्वर आहें. ९ मीं पवित्र वस्तूंविषयीं जी आज्ञा केली आहे ती याजकांनीं पाळावी; ती न मानून त्या वस्तु भ्रष्ट केल्यास त्यांस त्याबद्दल पातकाचा भार वाहावा लागेल, व त्यामुळें ते मरतील; त्यांस पावन करणारा मी परमेश्वर आहें.

१० कोणा परक्यानें पवित्र पदार्थ खाऊं नये; तो याजकाच्या घरचा पाहुणा किंवा मजूर असला तरी त्यानेंहि पवित्र पदार्थ खाऊं नये. ११ पण याजकानें मोल देऊन कोणी मनुष्य विकत घेतला असला तर त्यानें तो खावा. तसेंच याजकाच्या घरीं जन्मले असतील त्यांनींहि तो खावा. १२ याजकाची कन्या कोणा परक्याला दिली असली तर तिनें समर्पण केलेले पवित्र पदार्थ खाऊं नयेत. १३ याजकाची कन्या विधवा असली अथवा नवऱ्यानें तिचा त्याग केला असला, आणि ती अनपत्य असून तरुणपणीं होती तशीच आपल्या पित्याच्या घरीं परत येऊन राहत असली तर तिनें आपल्या पित्याच्या अन्नाचें सेवन करावें; पण कोणी परक्यांनीं तें खाऊं नये. १४ कोणी मनुष्यानें चुकून पवित्र पदार्थ खाल्ला तर त्यानें त्या पदार्थाच्या पांचव्या हिश्शाइतकी त्यांत भर घालून याजकास मोबदला द्यावा. १५ इस्राएल लोक ज्या पवित्र वस्तु परमेश्वराला अर्पितात त्या त्यांनीं भ्रष्ट करूं नयेत; १६ पवित्र पदार्थ खाल्ल्यानें उद्भवणारा त्यांचा दोषजनक अधर्मभार वाहण्यास याजकांनीं कारण होऊं नये; कारण त्यांस पावन करणारा मी परमेश्वर आहें.

१७ परमेश्वर मोशाला म्हणाला, १८ अहरोन, त्याचे पुत्र व सर्व इस्राएल लोक यांस सांग: इस्राएल लोकांपैकीं अथवा इस्राएल लोकांत राहणाऱ्या उपरी लोकांपैकीं कोणी आपल्या नवसाच्या अथवा स्वसंतोषाच्या बलीचा परमेश्वराप्रीत्यर्थ होम करील १९ तर तुमचा स्वीकार करण्यांत यावा म्हणून गुरें, मेंढरें अथवा बकरीं यांतला निर्दोष नर अर्पण करावा. २० दोष असलेला कोणताहि प्राणी अर्पूं नये; कारण तो तुमच्याप्रीत्यर्थ स्वीकारिला जाणार नाहीं. २१ आपला नवस पुरा करण्यासाठीं अथवा स्वसंतोषाच्या अर्पणासाठीं कोणी परमेश्वराप्रीत्यर्थ गुरांढोरांतून किंवा शेरडांमेंढरांतून शांत्यर्पण करील तर तें मान्य व्हावयासाठीं निर्दोष असावें, त्यांत कांहीं दोष नसावा. २२ अंधळा, अवयव भग्न झालेला, लुळा अथवा अंगावर मस, नायटे अथवा खरूज असलेला असा कोणताहि प्राणी परमेश्वराला अर्पूं नये किंवा त्याचा वेदीवर हव्य म्हणून परमेश्वराप्रीत्यर्थ होम करूं नये. २३ बैल, मेंढा अथवा बकरा याचा एखादा अवयव अधिकउणा असला तर तो स्वसंतोषाच्या अर्पणास चालेल, पण नवस फेडावयाच्या कामीं त्याचा अंगीकार होणार नाहीं. २४ ज्याचे अंड दबलेले, बडविलेले, फुटलेले अथवा कापिलेले असतील असा कोणताहि प्राणी परमेश्वरास

अर्पण करूं नये; तूं आपल्या देशीं असला कांहीं प्रकार
करूं नये. २५ यांतले कोणतेहि प्राणी परक्याच्या हातून
घेऊन आपल्या देवास अन्न म्हणून अर्पण करूं नयेत;
कारण त्यांच्यांत व्यंग आहे, त्यांच्यांत दोष आहे,
म्हणून ते तुम्हांप्रीत्यर्थ स्वीकारण्यांत यावयाचे नाहींत.
२६ परमेश्वरानें मोशाला सांगितलें : २७ वासरूं,
कोकरूं अथवा करडूं जन्मल्यावर सात दिवस आपल्या
आईखालीं असलें पाहिजे; आठव्या दिवसापासून पुढें
तें परमेश्वराला हव्यरूपानें अर्पण करण्यासाठीं स्वीकार-
ण्यास योग्य ठरेल. २८ गाईचा अथवा मेंढीचा व
तिच्या वत्साचा एकाच दिवशीं बलि देऊं नये.
२९ तुम्ही परमेश्वराप्रीत्यर्थ शांत्यर्पणाच्या बलीचा यज्ञ
कराल तेव्हां तुमचा अंगीकार होईल अशा प्रकारें तो
करावा. ३० त्याच दिवशीं तो खाण्यांत यावा;
त्यांतला कांहीं सकाळपर्यंत ठेवूं नये; मी परमेश्वर
आहें. ३१ तुम्हीं माझ्या आज्ञा मान्य करून त्या
पाळाव्या; मी परमेश्वर आहें. ३२ माझ्या पवित्र
नामास तुम्हीं बट्टा लावूं नये; इस्राएल लोकां-
मध्यें मला पवित्र मानिलें जावो; तुम्हांस पावन
करणारा मी परमेश्वर आहें. ३३ तुमचा देव व्हावें
म्हणून मीं तुम्हांस मिसर देशांतून बाहेर आणिलें;
मी परमेश्वर आहें.

२३ १ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्राएल
लोकांस सांग : पवित्र मेळे भरविण्यासाठीं परमे-
श्वराच्या ज्या पर्वकाळांची तुम्हीं प्रसिद्धि कराव-
याची ते माझे पर्वकाळ हे : ३ सहा दिवस सर्व कामकाज
करावें, पण सातवा दिवस परम विश्रामदिन व पवित्र
मेळ्याचा दिवस होय; या दिवशीं तुम्हीं कोणतेंहि
काम करूं नये; तुमच्या सर्व घरांघरांतून हा परमेश्वराचा
शब्बाथ असावा.

४ परमेश्वराचे जे पर्वकाळ म्हणजे पवित्र मेळ्याचे
दिवस तुम्हीं नियमित समयीं प्रसिद्ध करावे ते हे :
५ पहिल्या महिन्याच्या चतुर्दशीस सायंकाळीं परमेश्वराचा
वल्हांडण सण येतो. ६ त्याच महिन्याच्या पंधराव्या
दिवशीं परमेश्वराप्रीत्यर्थ बेखमीर भाकरीचा सण सुरू
होतो; त्यांत तुम्हीं सात दिवस बेखमीर भाकर खावी.
७ त्यांपैकीं पहिल्या दिवशीं तुम्हीं पवित्र मेळा भरवावा;
त्या दिवशीं अंगमेहनतीचें कांहीं काम करूं नये.
८ सात दिवस तुम्हीं परमेश्वरास हव्य अर्पावें; सातव्या
दिवशीं पवित्र मेळा भरवावा; त्या दिवशीं अंगमेहनतीचें
कांहीं काम करूं नये.

९ परमेश्वर मोशाला म्हणाला, १० इस्राएल लोकांस
सांग : जो देश मी तुम्हांस देत आहें त्यांत तुम्ही
जाऊन पोहंचाल व त्यांतलें पीक कापाल तेव्हां आपल्या
पिकाच्या पहिल्या उपजाची पेंढी याजकाकडे आणावी;
११ ती तुम्हांप्रीत्यर्थ स्वीकारण्यांत यावी म्हणून ती
त्यानें परमेश्वरासमोर ओवाळावी; शब्बाथाच्या दुसऱ्या
दिवशीं याजकानें ती ओवाळावी. १२ पेंढीची ओवाळणी
कराल त्या दिवशीं एका वर्षाच्या एका निर्दोष मेंढ्याचा
परमेश्वराप्रीत्यर्थ होम करावा. १३ त्याबरोबरचा अन्न-
बलि दोन दशमांश एफा तैलमिश्रित सपिठाचा असावा;
हें परमेश्वराला सुवासिक हव्य होईल; आणि त्याबरोबर
एक चतुर्थांश हिन द्राक्षारस अर्पावा. १४ हें
सर्व अर्पिण्यासाठीं तुम्हीं आपल्या देवासमोर घेऊन
जाल त्या दिवसापर्यंत नव्या पिकाची भाकर खाऊं
नये. तसेंच हुरडा किंवा हिरवें धान्य खाऊं नये;
तुमच्या सर्व घरीं हा पिढ्यानपिढ्या निरंतरचा
विधि होय.

१५ शब्बाथाच्या दुसऱ्या दिवशीं तुम्हीं ओवाळ-
णीची पेंढी आणाल तेव्हांपासून पुरे सात शब्बाथ
मोजावे; १६ सातव्या शब्बाथाच्या दुसरे दिवशीं
पन्नासावा दिवस मोजून त्या दिवशीं परमेश्वराप्रीत्यर्थ
नवें अन्नार्पण करावें. १७ तुम्हीं आपल्या घरांतून
दोन दशमांश एफाभर सपिठाच्या दोन भाकरी ओवा-
ळणीसाठीं आणाव्या; त्या खमीर घालून भाजाव्या;
परमेश्वराप्रीत्यर्थ हें प्रथम उपजाचें अर्पण होय.
१८ वर्षावर्षाचीं सात निर्दोष कोकरें, एक गोऱ्हा
आणि दोन मेंढे भाकरींबरोबर अर्पावे; त्यांबरोबरचें
अन्नार्पण व पेयार्पण यांसह त्यांचा परमेश्वराप्रीत्यर्थ होम

१ **मुळांत** : पेसाख.

करावा; हें परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य होय. १९ मग
पापार्पणासाठीं एक बकरा व शांत्यर्पणाच्या यज्ञासाठीं
एकएक वर्षाचे दोन मेंढे अर्पावे. २० याजकानें तीं
प्रथम उपजाच्या भाकरीबरोबर त्या मेंढ्यांसह परमे-
श्वरासमोर ओवाळावीं; हीं परमेश्वराप्रीत्यर्थ पवित्र
असून याजकाचा भाग व्हावीं. २१ तुम्हीं त्याच दिवशीं
हें जाहीर करावें कीं या दिवशीं आपला एक पवित्र
मेळा भरणार, म्हणून कोणींहि या दिवशीं अंगमेहनतीचें
काम करूं नये; तुमच्या सर्व घरीं तुम्हांस हा
पिढ्यानपिढ्या निरंतरचा विधि होय.

२२ तुम्ही आपल्या देशांतील पीक कापाल तेव्हां
कोनाकोपऱ्याची झाडून सारी कापणी करूं नका,
आणि आपल्या पिकाचा सरवा वेंचूं नका; गरीब
व विदेशी यांच्यासाठीं तो राखून ठेवा; मी परमेश्वर
तुमचा देव आहें.

२३ परमेश्वर मोशाला म्हणाला, २४ इस्राएल
लोकांस सांग: सातव्या महिन्याची प्रतिपदा तुम्हांस
परमविश्रामाची असावी; स्मरण देण्यासाठीं त्या
दिवशीं रणशिंगें फुंकावीं व पवित्र मेळा भरवावा.
२५ त्या दिवशीं तुम्हीं अंगमेहनतीचें कांहीं काम
करूं नये, तर परमेश्वराला हव्य अर्पावें.

२६ परमेश्वरानें मोशाला सांगितलें: २७ त्याच
सातव्या महिन्याच्या दशमीस प्रायश्चित्ताचा दिवस
पाळावा; त्या दिवशीं तुमचा पवित्र मेळा भरावा; त्या
दिवशीं तुम्हीं आपल्या जिवांस क्लेश द्यावा आणि परमे-
श्वराला हव्य अर्पावें. २८ त्या दिवशीं तुम्हीं कोणतेंहि
काम करूं नये; कारण हा प्रायश्चित्ताचा दिवस होय; त्या
दिवशीं तुमचा देव परमेश्वर याजसमोर तुम्हांसाठीं
प्रायश्चित्त करण्यांत यावें. २९ त्या दिवशीं जो मनुष्य
आपल्या जिवाला क्लेश देत नाहीं त्याचा स्वजनांतून
उच्छेद व्हावा. ३० कोणी मनुष्य त्या दिवशीं कोणतेंहि
काम करील तर त्याचा मी स्वजनांतून उच्छेद करीन.
३१ तुम्हीं कोणतेंहि काम करूं नये; तुमच्या सर्व घरीं
तुम्हांस तो पिढ्यानपिढ्या निरंतरचा विधि होय.
३२ तो दिवस तुम्हांस परम विश्रामदायक व्हावा व
तुम्हीं आपल्या जिवांस क्लेश द्यावा; आणि त्या
महिन्याच्या नवव्या दिवशीं एका सायंकाळपासून
दुसऱ्या सायंकाळपर्यंत तुम्हीं शब्बाथ पाळावा.

३३ परमेश्वर मोशाला म्हणाला, ३४ इस्राएल
लोकांस सांग: त्याच सातव्या महिन्याच्या पंधराव्या
दिवसापासून सात दिवसपर्यंत परमेश्वराप्रीत्यर्थ मांडवांचा
सण पाळावा. ३५ पहिल्या दिवशीं पवित्र मेळा भरवावा;
त्या दिवशीं अंगमेहनतीचें कांहीं काम करूं नये.
३६ सात दिवस परमेश्वराला हव्य अर्पावें व आठव्या
दिवशीं आपला पवित्र मेळा भरवून परमेश्वराला
हव्य अर्पावें; हा महामेळ्याचा समारोपदिन होय; त्या
दिवशीं कोणतेंहि अंगमेहनतीचें काम करूं नये.

३७ परमेश्वराचे पर्वकाळ हे होत; त्यांत हव्य म्हणजे
होमबलि; अन्नबलि, शांत्यर्पण व पेयार्पण त्या त्या
दिवसानुसार परमेश्वरास अर्पावें म्हणून पवित्र मेळे
भरावे असें तुम्हीं प्रसिद्ध करावें; ३८ ह्यांशिवाय
आणखी पाळावयाचे सण म्हणजे परमेश्वराचे
शब्बाथ पाळणें, भेटी अर्पिणें, सर्व नवस फेडणें
आणि परमेश्वरास स्वसंतोषाचीं सर्व अर्पणें करणें
हे आहेत.

३९ देशांतलें उत्पन्न गोळा केल्यावर त्याच सातव्या
महिन्याच्या पंधराव्या दिवसापासून सात दिवसपर्यंत
परमेश्वराप्रीत्यर्थ सण पाळावा; पहिला दिवस व आठवा
दिवस हे परम विश्रामदिन होत. ४० पहिल्या दिवशीं
तुम्हीं चांगल्या चांगल्या वृक्षांचीं फळें, खजुरीच्या झावळ्या,
दाट पालवीच्या वृक्षांच्या डाहळ्या, ओहळाजवळचे
वाळुंज हीं आणून परमेश्वर तुमचा देव याजसमोर
सात दिवस उत्सव करावा. ४१ वर्षानुवर्ष सात
दिवसपर्यंत परमेश्वराप्रीत्यर्थ हा सण पाळावा;
तुमचा हा पिढ्यानपिढ्या निरंतरचा विधि होय;
सातव्या महिन्यांत हा सण पाळावा. ४२ तुम्हीं सात
दिवस मांडवांत राहावें; जितके जन्मतः इस्राएल
आहेत त्यांनीं मांडवांत राहावें; ४३ म्हणजे तुमच्या
पुढल्या पिढ्यांस कळेल कीं मीं इस्राएल लोकांस मिसर
देशांतून बाहेर काढिलें तेव्हां त्यांची मांडवांत

वस्ती करविली; मी परमेश्वर तुमचा देव आहें.
४४ याप्रमाणें मोशानें इस्राएल लोकांस परमेश्वराचे
पर्वकाळ सांगितले.

२४ १ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्राएल
लोकांस ही आज्ञा कर: दीप सतत पेटत
राहून उजेड व्हावा म्हणून जैतुनाचें कुटून
काढलेलें निरे तेल त्यांनीं तुजकडे घेऊन यावें;
३ अहरोनाने उपात डपांत आज्ञापटाच्या अंतरपटा-
बाहेर परमेश्वरासमोर नित्य संध्याकाळपासून सकाळ-
पर्यंत त्याची व्यवस्था ठेवावी; हा तुमचा पिढ्यान-
पिढ्या निरंतरचा विधि होय. ४ त्यानें हे दिवे
शुद्ध दीपवृक्षावर परमेश्वरासमोर निरंतर ठेवण्याची
व्यवस्था करावी.
५ तूं सपीठ घेऊन त्याच्या बारा पोळ्या भाज;
एकेक पोळी दोन दशमांश एफाभर सपिठाची करावी.
६ त्यांच्या दोन रांगा करून एकेका रांगेस सहासहा
पोळ्या शुद्ध मेजावर परमेश्वरासमोर ठेवाव्या.
७ एकेका रांगेवर शुद्ध धूप ठेव म्हणजे तो त्या
पोळींचें परमेश्वराला स्मरण देणारें हव्य असा होईल.
८ प्रत्येक शब्बाथवारीं त्यानें परमेश्वरासमोर त्या सतत
मांडाव्या; इस्राएल लोकांच्या वतीचा हा निरंतरचा
करार होय. ९ ही पोळी अहरोन व त्याचे पुत्र यांचा
वांटा होय; त्यांनीं ती पवित्र स्थळीं खावी; कारण
निरंतरच्या विधीप्रमाणें परमेश्वराला अर्पिलेल्या हव्यांपैकीं
ती त्याला परम पवित्र होय.
१० त्या काळीं कोणा इस्राएल स्त्रीचा मिसरी
बापाच्या पोटचा एक पुत्र होता, तो इस्राएल
लोकांमध्यें गेला; तेव्हां तो आणि एक इस्राएल माणूस
छावणींत भांडूं लागले. ११ तो इस्राएल स्त्रीचा पुत्र
परमेश्वराच्या नामाची निंदा करून त्याला शिव्याशाप
देऊं लागला; तेव्हां त्यास मोशाकडे आणिलें. त्याच्या
आईचें नांव शलोमीथ असें असून ती दान वंशांतील
दिब्री याची कन्या होती. १२ त्याच्यासंबंधानें
परमेश्वर काय सांगतो तें कळावें म्हणून त्यांनीं
त्यास अटकेंत ठेविलें.
१३ मग परमेश्वरानें मोशाला सांगितलें, १४ तुम्ही
त्या शिव्याशाप देणाऱ्यास छावणीच्या बाहेर घेऊन जा;
जितक्यांनीं ती निंदा ऐकली तितक्यांनीं आपले हात
त्याच्या मस्तकावर ठेवावे; नंतर सर्व मंडळीनें त्यास
दगडमार करावा. १५ तूं इस्राएल लोकांस सांग कीं
जो कोणी आपल्या देवास शिव्याशाप देईल त्याच्या
दुष्कर्माचें त्याला फळ मिळेल. १६ परमेश्वराच्या नामाची
निंदा करणाऱ्यास अवश्य जिवें मारावें; सर्व मंडळीनें
त्यास अवश्य दगडमार करावा; तो परदेशीय असो
अगर स्वदेशीय असो, त्यानें परमेश्वराच्या नामाची निंदा
केली तर त्यास जिवें मारावें. १७ जो कोणी मनुष्य-
हत्या करील त्यास अवश्य जिवें मारावें; १८ जो
कोणी एखाद्या ग्रामपशूस जिवें मारील त्यानें प्राण्या-
बद्दल प्राणी देऊन भरपाई करावी. १९ कोणी आपल्या
शेजाऱ्याचा देह व्यंग करील तर त्यानें जसें केलें
असेल तसेंच त्याला करावें; २० अवयवभंगाबद्दल
अवयवभंग, डोळ्याबद्दल डोळा, दांताबद्दल दांत,
याप्रमाणें त्यानें जसा अपकार केला असेल तसाच
त्याला करावा. २१ पशु मारणाऱ्यानें त्याची भरपाई
करावी, पण मनुष्यहत्या करणाऱ्यास मारून टाकावें.
२२ तुम्ही स्वदेशीय असा किंवा परदेशीय असा,
तुम्हां सर्वांना एकच नियम आहे, कारण मी परमेश्वर
तुमचा देव आहें. २३ मोशानें इस्राएल लोकांस
याप्रमाणें सांगितलें तेव्हां त्यांनीं त्या शिव्याशाप
देणाऱ्यास छावणीबाहेर घेऊन जाऊन दगडमार केला.
परमेश्वरानें मोशाला आज्ञा केली त्याप्रमाणें इस्राएल
लोकांनीं केलें.

२५ १ परमेश्वर सीनाय पर्वतापाशीं मोशाला
म्हणाला, २ इस्राएल लोकांस असें सांग: जो
देश मी तुम्हांस देत आहें त्यांत तुम्ही जाऊन
पोहंचलां म्हणजे परमेश्वराप्रीत्यर्थ देशास विश्राम मिळावा.
३ सहा वर्षें आपली शेती करावी आणि सहा वर्षें
द्राक्षमळा खच्ची करून त्याचें उत्पन्न जमा करावें;
४ पण सातव्या वर्षी भूमीस परमविश्रामाचा शब्बाथ

परमेश्वराप्रीत्यर्थ असावा; त्या वर्षी शेतें पेरूं नयेत
अथवा मळे खची करूं नयेत, ५ आपोआप उगवलेलें
धान्य कापूं नये; खची न केलेल्या द्राक्षवेलीचीं फळें
तोडूं नयेत; भूमीच्या परमविश्रामाचें तें वर्ष असावें.
६ भूमीच्या विश्रामकालच्या उपजावर तुमचा, तुमच्या
दासदासींचा, तुमच्या मजुरांचा व तुमच्याबरोबर
राहणाऱ्या परदेशीयांचा निर्वाह होईल; ७ तुमचे
पशु व देशांतील जनावरें यांस भूमीचें सर्व उत्पन्न
खावयास मिळेल.

८ सात विश्रामवर्षें म्हणजे सात गुणिले सात एवढीं
वर्षें मोजा; या सात विश्रामवर्षांचा काळ एकुणपन्नास वर्षें
होय. ९ मग सातव्या महिन्याच्या दशमीस म्हणजे
प्रायश्चित्ताच्या दिवशीं महानादाचें शिंग देशभर सर्वत्र
फुंकावें. १० त्या पन्नासाव्या वर्षास पवित्र मानावें आणि
देशांतल्या सर्व रहिवाश्यांस मुक्ततेची घोषणा करावी;
या वर्षास तुम्हीं योबेल म्हणावें: या वर्षी तुम्हीं आप-
आपल्या वतनांत व आपआपल्या घरीं परत जावें. ११ हें
पन्नासावें वर्ष तुमचें योबेल वर्ष होय: या वर्षी तुम्हीं
कांहीं पेरूं नये, आपोआप उगवलेलें कापूं नये,
आणि खची न केलेल्या द्राक्षवेलीचीं फळेंहि खुडूं
नयेत; १२ कारण हें योबेल वर्ष होय: हें तुम्हांला
पवित्र असावें: या वर्षी तुम्हीं शेतांत सांपडेल तो
उपज खावा.

१३ या योबेल वर्षी तुम्ही सर्वांनीं आपआपल्या
वतनांत परत जावें. १४ तुम्ही आपल्या भाऊबंदांला
कांहीं विकाल किंवा त्यांच्या हातून कांहीं विकत घ्याल
तेव्हां एकमेकांचा अन्याय करूं नका. १५ योबेल
वर्षानंतर जितकीं वर्षें झालीं असतील त्यांच्या संख्ये-
प्रमाणें आपल्या भाऊबंदांपासून मोल घ्यावें, व तितक्या
वर्षांच्या उत्पन्नानुसार त्यांनीं विक्री करावी. १६ त्या
वर्षांची संख्या अधिक असली तर त्या मानानें
मोल वाढवावें आणि कमी असली तर त्या मानानें
मोल कमी करावें: कारण जितकीं पिकें झालीं
असतील त्यांच्या हिशोबानें त्यांनीं ती विक्री करावी.
१७ तुम्ही एकमेकांचा अन्याय करूं नये: तर
आपल्या देवाचें भय बाळगावें; कारण मी परमेश्वर
तुमचा देव आहें.

१८ याकरितां तुम्हीं माझे विधि मानावे आणि माझ्या
नियमांकडे ध्यान देऊन ते पाळावे: असें केल्यानें तुम्ही
देशांत निर्भय वस्ती कराल; १९ भूमि आपला उपज
देईल, व तुम्ही पोटभर खाल; व तींत निर्भय वस्ती कराल.
२० तुम्ही कदाचित् म्हणाल, आम्हीं सातव्या वर्षी
काय खावें? कारण त्या वर्षी आम्हांस पेरावयाचें नाहीं
व शेताचें उत्पन्न जमा करावयाचें नाहीं, २१ तर मी
सहाव्या वर्षी तुम्हांस अशी बरकत देईन कीं, जमीन
तुम्हांस तीन वर्षांचें उत्पन्न देईल. २२ मग आठव्या
वर्षी तुम्ही पेराल आणि जुना सांठा खात राहाल:
नवव्या वर्षाचें पीक हातीं येईपर्यंत त्या वर्षी तुम्ही
जुना सांठा खात राहाल.

२३ जमीन विकावयाची ती कायमची विकून टाकू
नका: कारण जमीन माझी आहे व तुम्ही माझ्या आश्रयास
परदेशीय व उपरी असे राहणार; २४ म्हणून तुमच्या
वतनाच्या सगळ्या व्यवहारांत जमीन सोडवून घेण्यासंबंधानें
तुम्हीं तरतूद करावी. २५ तुझा कोणी भाऊबंद कंगाल
होऊन त्यानें आपल्या वतनाचा कांहीं भाग विकला तर
त्याच्या जवळच्या आप्तानें पुढें होऊन आपल्या भाऊबंदानें
विकलेला विभाग सोडवून घ्यावा. २६ एकाद्या मनु-
ष्याचा वतनभाग सोडवून घेणारा कोणी नसला, व
आपला वतनभाग त्याला स्वतांला सोडवून घेतां येईल
एवढी त्याची ऐपत वाढली, २७ तर त्यानें तें वतन
विकून टाकिलें असेल त्या वर्षापासून हिशोब करून
बाकीच्या वर्षांचें उत्पन्न विकत घेणाऱ्यास द्यावें,
आणि आपल्या वतनावर परत जावें; २८ पण तें
वतन परत मिळविण्यास त्याला ऐपत नसली तर
आपली विकलेली जमीन विकत घेणाऱ्याच्या ताब्यांत
योबेल वर्षापर्यंत राहूं द्यावी; योबेल वर्षी ती सुटेल
तेव्हां त्यानें आपल्या वतनावर परत जावें.

२९ कोणी मनुष्यानें तटबंदीच्या नगरांत असलेलें
आपलें घर विकिलें तर तें विकिल्यावर एक वर्षाच्या
आंत पैसे देऊन त्याला तें सोडवितां येईल: पैसे देऊन

सोडविण्याचा हक्क त्याला पुरें एक वर्ष राहील. ३० एका
पुऱ्या वर्षाच्या आंत तें सोडविलें नाहीं तर तटबंदीच्या
नगरांत असलेलें तें घर विकत घेणाऱ्याचें होऊन
पिढ्यानपिढ्या त्याच्या वंशांत कायमचें राहील; योबेल
वर्षी तें सुटणार नाहीं; ३१ पण तटबंदी नसलेल्या
खेड्यांतून जीं घरें असतील तीं देशांतील शेतांसमान
लेखावीं; तीं सोडवितां येतील आणि योबेल वर्षी त्यांची
सुटका होईल. ३२ लेव्यांच्या वतनी नगरांत बांधिलेलीं
घरें लेव्यांस पाहिजे तेव्हां सोडवितां येतील. ३३ एकाद्या
लेव्याचें घर दुसऱ्या कोणीं सोडविलें तर त्याच्या वतनी
नगरांमध्यें असलेलें त्याचें तें विकिलेलें घर योबेल
वर्षी सुटेल; कारण इस्राएलांमध्यें लेव्यांचें वतन म्हटलें
म्हणजे त्यांच्या नगरांतील घरेंच होत. ३४ त्यांच्या
नगरांच्या शिवारांची जमीन विकावयाची नाहीं; तें त्यांचें
निरंतरचें वतन होय.

३५ तुझा कोणी भाऊबंद कंगाल झाला आणि
त्याचा हात चालेना असें तुला दिसलें तर तूं त्यास
आधार द्यावा. परदेशीयाप्रमाणें अथवा उपऱ्याप्रमाणें
तो तुझ्याजवळ राहील. ३६ त्याजपासून व्याज अथवा
वर्ताळा घेऊं नको; आपल्या देवाचें भय धरून आपल्या-
पाशीं आपल्या भाऊबंदास राहूं दे. ३७ तूं आपला
पैसा त्याला व्याजानें देऊं नको, किंवा आपला दाणा-
गोटा त्याला वाढीदिढीनें देऊं नको. ३८ मी परमेश्वर
तुमचा देव आहें; तुम्हांस कनान देश द्यावा व
तुमचा देव व्हावें म्हणून मीं तुम्हांस मिसर देशांतून
बाहेर आणिलें.

३९ तुझा कोणी भाऊबंद तुझ्यासमोर कंगाल
झाला व त्यानें स्वतांस तुला विकलें तर त्याजपासून
दास्य करून घेऊं नको; ४० मजुराप्रमाणें किंवा
उपऱ्याप्रमाणें तो तुझ्यापाशीं राहावा; योबेल वर्षापर्यंत
तो तुझी सेवाचाकरी करील; ४१ त्या वर्षी आपल्या
मुलांबाळांसहित त्यानें तुझ्यापासून निघून आपल्या
कुटुंबांत व आपल्या वाडवडिलांच्या वतनांत परत जावें.
४२ कारण मिसर देशांतून ज्यांना मीं बाहेर काढिलें
ते माझे दास होत. दासांप्रमाणें त्यांची विक्री
करावयाची नाहीं. ४३ कठोरपणानें त्याजवर अधिकार
चालवूं नको; आपल्या देवाचें भय धर. ४४ तुम्हांस
दास व दासी ठेवावयाच्या असतील तर त्या तुम्ही
अन्य राष्ट्रांतून घ्याव्या; दास व दासी हीं त्यांच्यांतूनच
खरेदी करावीं. ४५ तुमच्यामध्यें येऊन राहिलेले जे
उपरी लोक आणि त्यांच्या पोटीं जीं घराणीं तुमच्या
देशांत पैदा झालीं असतील त्यांपैकीं दास व दासी
तुम्हांस खरेदी करितां येतील, ती तुमची मालमत्ता होय.
४६ तुम्हीं आपल्यामागें आपल्या पुत्रांस त्यांचा ताबा
द्यावा, व तीं त्यांचा वतनभाग ठरतील; त्या लोकांपैकीं
तुम्हांस कायमचे दास करितां येतील, पण तुमच्या
इस्राएल भाऊबंदांनीं परस्परांवर आपला अधिकार
कठोरतेनें चालवूं नये.

४७ तुझ्या गांवीं असलेला कोणी परदेशीय अथवा
उपरी धनवान् झाला असेल, व त्याच्याजवळ असलेला
तुझा एकादा बंधु कंगाल होऊन त्यानें आपणास त्या
परदेशीयास अथवा त्या उपरी मनुष्यास किंवा त्याच्या
वंशांतल्या कोणास विकलें असेल, ४८ तर
त्याचा विक्रय झाल्यावर त्याला सोडवून घेतां येईल;
त्याच्या भाऊबंदांपैकीं कोणासहि त्याला सोडवितां
येईल; ४९ आपला चुलता, आपला चुलतभाऊ अथवा
आपल्या कुळांपैकीं कोणी जवळचा आप्त यास त्याला
सोडवितां येईल अथवा तो स्वतःच धनवान् झाला तर
त्याला आपली सुटका करून घेतां येईल. ५० ज्यानें
त्यास विकत घेतलें असेल त्याजपाशीं त्यानें आपल्या
विक्रीच्या वर्षापासून योबेल वर्षापर्यंत हिशेब करावा;
वर्षांच्या संख्येप्रमाणें विक्रीचा दाम ठरवावा; मजुराच्या
रोजाप्रमाणें दाम आकारण्यांत यावा. ५१ योबेल
वर्षास पुष्कळ वर्षें असलीं तर जितक्या रकमेस
त्याची विक्री झाली असेल तिच्यापैकीं आपल्या खंडाचा
दाम त्या वर्षांच्या संख्येप्रमाणें त्याला परत द्यावा.
५२ योबेलास थोडीं वर्षें असलीं तरी त्यानें आपल्या
धन्याचा हिशेब करून आपल्या खंडाचा दाम तेवढ्याच
वर्षांचा त्याला परत द्यावा. ५३ त्यानें आपल्या धन्या-
बरोबर सालदाराप्रमाणें राहावें; त्याच्या धन्यानें

तुमच्यासमोर त्याच्यावर कठोरतेनें अधिकार चालवूं नये.
५४ या प्रकारें त्याची सुटका न झाली तर योबेल वर्षी
तो आपल्या मुलांबाळांसह सुटून जावा. ५५ कारण
इस्राएल लोक माझेच दास आहेत; मिसर देशांतून
काढिलेले हे माझे दास आहेत; मी परमेश्वर तुमचा
देव आहें.

२६ १ तुम्हीं आपणांसाठीं मूर्ति करूं नयेत; त्या-
प्रमाणेंच कोरींव मूर्ति अथवा स्तंभ उभारूं नयेत
अथवा आकृति कोरलेला पाषाण पुजण्यासाठीं
आपल्या देशांत स्थापन करूं नये; मी परमेश्वर
तुमचा देव आहें. २ तुम्हीं माझे शब्बाथ पाळावे
आणि माझ्या पवित्रस्थानाविषयीं पूज्यबुद्धि बाळगावी;
मी परमेश्वर आहें.

३ तुम्हीं माझ्या विधींप्रमाणें चाललां आणि माझ्या
आज्ञा पाळून त्यांप्रमाणें वर्तलां, ४ तर योग्य काळीं
तुम्हांकरितां मी पर्जन्यवृष्टि करीन, जमीन आपला उपज
देईल व मळ्यांतील वृक्ष आपआपलीं फळें देतील.
५ द्राक्षांच्या हंगामापर्यंत तुम्ही धान्याची मळणी करीत
राहाल आणि पेरणीच्या वेळेपर्यंत द्राक्षांची खुडणी
करीत राहाल; तुम्ही मनमुराद अन्न खाल व आपल्या
देशांत निर्भय वस्ती कराल. ६ मी तुमच्या देशास
शांतता देईन, व तुम्ही निजाल तेव्हां तुम्हांस कोणा-
पासून भय प्राप्त होणार नाहीं; मी देशांतून दुष्ट पशु
नाहींतसे करीन, आणि तुमच्या देशांत तरवार
चालणार नाहीं. ७ तुम्ही आपल्या शत्रूंस पळवून
लावाल; ते तुमच्यापुढें तरवारीनें पडतील. ८ तुमच्यांतले
पांच असामी शंभराला, शंभर असामी दहा हजारांला
पळवून लावितील आणि तुमचे शत्रु तुमच्यापुढें
तरवारीनें पडतील. ९ मी तुम्हांवर कृपादृष्टि करून
तुम्हांस फलद्रूप व बहुगुणित करीन व तुमच्याशीं केलेला
माझा करार पूर्ण करीन. १० तुम्ही बहुत दिवस
सांठवून ठेविलेलें धान्य खाल, व नवें धान्य आल्यावरहि
जुनें बाहेर काढाल. ११ मी तुमच्यामध्यें आपला
निवास करीन; माझ्या जिवाला तुमचा कंटाळा वाटणार
नाहीं. १२ तुमच्याबरोबर माझा समागम होईल;
मी तुमचा देव होईन, व तुम्ही माझी प्रजा व्हाल.
१३ मी परमेश्वर तुमचा देव आहें; तुम्हीं मिसऱ्यांचे
दास राहूं नये म्हणूनच मीं तुम्हांस मिसर देशांतून
काढून आणिलें; मीं तुमचीं जोखडें मोडून तुम्हांस
ताठ चालविलें आहे.

१४ यावर तुम्हीं माझें ऐकलें नाहीं, या सर्व
आज्ञा पाळल्या नाहींत, १५ माझ्या विधींचा अव्हेर
केला, तुमच्या जिवानें माझे निर्बंध तुच्छ मानिले,
आणि माझ्या सर्व आज्ञा अमान्य करून माझा
करार मोडिला, १६ तर मी तुमचें काय करीन
तें ऐका: मी तुम्हांस घाबरे करीन, क्षयरोग व
ज्वर यांनीं तुम्हांस पीडीन; त्यामुळें तुमचे डोळे क्षीण
होतील व तुमचा जीव झुरणीस लागेल; तुम्हीं बियाणें
पेराल तें व्यर्थ जाईल, कारण त्याचें उत्पन्न तुमचे शत्रु
खाऊन टाकितील. १७ मी तुम्हांस विमुख होईन; तुमच्या
शत्रूंपुढें तुमचा संहार होईल; तुमचे वैरी तुम्हांवर अधि-
कार चालवितील व कोणी पाठीस लागला नसूनहि तुम्ही
पळाल. १८ इतकें केल्यावरहि तुम्हीं माझें ऐकलें नाहीं
तर तुमच्या पापास्तव मी तुम्हांस सातपट शिक्षा
करीन. १९ तुमच्या बलाचा गर्व भग्न करीन व तुम्हांस
आकाश लोखंडासारखें व भूमि पितळेसारखी करीन;
२० तुमच्या शक्तीचा व्यय व्यर्थ होईल, कारण
तुमची भूमि कांहीं उपज द्यावयाची नाहीं व देशांतील
वृक्ष फळें देणार नाहींत.

२१ माझ्याविरुद्ध तुम्हीं चालाल व माझें
ऐकणार नाहीं तर तुमच्या पापांप्रमाणें तुम्हांवर सातपट
अनर्थ आणीन. २२ मी तुम्हांवर वनपशु सोडीन, ते
तुम्हांस अपत्यहीन करितील, तुमच्या गुरांढोरांचा
संख्या उडवितील, तुमची संख्या अल्प करितील आणि
त्यामुळें तुमचे रस्ते ओस पडतील.

२३ एवढ्या गोष्टी करूनहि तुम्ही सुधारून मजकडे
वळलां नाहीं आणि माझ्याविरुद्ध चाललां तर २४ मीहि
तुमच्या अगदीं विरुद्ध जाईन आणि मीच तुमच्या पापांस्तव
तुम्हांला सातपट ताडण करीन. २५ मी तुम्हांवर तरवार
आणीन, ती करार मोडिल्याचा बदला घेईल; तुम्ही

आपआपल्या नगरांत जमा व्हाल तेव्हां मी तुम्हांवर
मरी पाठवीन; मी तुम्हांस तुमच्या शत्रूच्या स्वाधीन
करीन. २६ मी तुमच्या अन्नाचा आधार तोडीन तेव्हां
दहा स्त्रिया एकाच भट्टींत तुमची भाकर भाजितील
आणि ती तुम्हांस तोलून देतील; ती खाऊन तुमची
तृप्ति व्हावयाची नाहीं.

२७ एवढें सर्व करूनहि माझें तुम्हीं ऐकलें नाहीं
व माझ्याविरुद्ध चाललां तर २८ मी संतापून
तुम्हांविरुद्ध चालेन आणि तुमच्या पापांबद्दल मी
तुम्हांस सातपट शिक्षा करीन. २९ आपले पुत्र व
कन्या यांचें मांस खाण्याची तुम्हांस पाळी येईल,
३० तुमच्या पूजेचीं उच्चस्थानें मी उध्वस्त करीन,
तुमच्या सूर्यमूर्ति फोडून टाकीन आणि तुमच्या
मूर्तींच्या मढ्यांवर तुमचीं मढीं फेंकून देईन; माझ्या
जिवास तुमची किळस येईल. ३१ मी तुमचीं नगरें
उजाड करीन, तुमचीं पवित्र स्थळें ओसाड करीन,
तुमच्या सुगंधी द्रव्यांचा सुवास मी घेणार नाहीं. ३२ मी
देशाची नासाडी करीन; देशांत वसणारे तुमचे शत्रु हें
पाहून चकित होतील. ३३ परराष्ट्रांमध्यें मी तुमची
पांगापांग करीन; मी तरवार उपसून तुमच्या पाठीस
लागेन; तुमचा देश उध्वस्त होईल आणि तुमचीं नगरें
ओसाड होतील.

३४ जितके दिवस देश ओस पडून तुम्ही आपल्या
शत्रूंच्या देशीं राहाल तितके दिवस देश शब्बाथ भोगीत
राहील; तेव्हां देशास विसावा मिळून तो आपले शब्बाथ
भोगीत राहील. ३५ देश ओस पडेल तोंवर त्याला
विश्राम मिळेल; तुम्ही त्यांत राहत असतां तुमच्या
शब्बाथांनीं मिळाला नाहीं असा विसावा त्यास मिळेल.
३६ तुमच्यांतील जे शेष राहतील त्यांच्या मनाला शत्रूंच्या
देशांत मी अशी दहशत घालीन कीं झाडाचें पान वाजलें
कीं ते पळून जातील; तरवार पाठीस लागली असतां
जसा कोणी पळतो तसे ते पळतील; कोणी पाठीस लागलें
नसूनहि ते पडतील. ३७ कोणी पाठीस लागलें
नसतांहि ते एकमेकांवर अडखळून पडतील; जशी
काय तरवारच त्यांच्या पाठीस लागली आहे; तुमच्या
शत्रूंशीं सामना करण्यास तुम्हांत त्राण उरणार नाहीं.
३८ तुम्ही राष्ट्रांराष्ट्रांतून पांगून नाश पावाल; तुमच्या
शत्रूंचा देश तुम्हांस ग्रासून टाकील. ३९ तुमच्यांतले
जे शेष राहतील ते आपल्या शत्रूंच्या देशीं आपल्या
अधर्मामुळें क्षीण होतील, आणि ते आपल्या वाडवडिलांच्या
अधर्मामुळें त्यांच्याचप्रमाणें क्षीण होतील.

४० त्यांनीं मजशीं बेइमानी केली, हा त्यांचा व
त्यांच्या वाडवडिलांचा अधर्म होय, असें ते कबूल
करितील; त्याप्रमाणेंच ते माझ्याविरुद्ध चालले ४१ या
कारणामुळें मींहि त्यांच्याविरुद्ध होऊन त्यांस शत्रूंच्या
देशांत आणिलें आहे असें ते कबूल करितील; आणि
त्यांचें बेसुनत (संस्कारविरहित) हृदय लीन होऊन ते
आपल्या अधर्माचा दंड मान्य करितील तर ४२ जो करार
मीं याकोबाशीं केला तो मी स्मरेन; त्याप्रमाणेंच इसहाक
व अब्राहाम यांजशीं माझा झालेला करार मी स्मरेन व
तो देशहि मी स्मरेन. ४३ देशांतून त्यांचा नायनाट
होईल आणि जोंपर्यंत तो त्यांच्याविरहित ओस राहील
तोंपर्यंत तो शब्बाथ भोगीत राहील; त्यांनीं माझ्या
निर्बंधांचा अव्हेर केला व माझे विधि तुच्छ मानिले
म्हणूनच त्यांच्या अधर्माबद्दल केलेला दंड ते मान्य
करितील. ४४ इतकें झालें तरी ते आपल्या शत्रूंच्या
देशीं असतां त्यांचा समूळ नाश करावा व त्यांशीं केलेला
करार अगदीं मोडून टाकावा, एवढा त्यांचा मी अव्हेर
करणार नाहीं अथवा त्यांचा मी धिक्कार करणार नाहीं;
कारण मी परमेश्वर त्यांचा देव आहें; ४५ मी त्यांच्या-
करितां त्यांच्या वाडवडिलांशीं केलेला करार स्मरेन, मी
त्यांचा देव व्हावें म्हणून मीं सर्व राष्ट्रांदेखत त्यांस मिसर
देशांतून बाहेर आणिलें; मी परमेश्वर आहें.

४६ जे विधि, निर्बंध व नियम परमेश्वरानें आपल्या
व इस्राएल लोकांच्या मध्यें सीनाय पर्वताजवळ
मोशाच्या हस्तें ठरविले ते हेच होत.

२७ १ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्राएल
लोकांस सांग: कोणा मनुष्यानें अघटित नवस
केला तर त्या माणसांचें मोल तूं ठरविशील तें

परमेश्वराला मान्य होईल. ३ तो वीस वर्षांपासून साठ
वर्षांच्या आंतला पुरुष असला तर पवित्रस्थानांतील
चलनाप्रमाणें त्याचें मोल पन्नास शेकेल रुपें असावें.
४ ती स्त्री असली तर तिचें मोल तीस शेकेल असावें.
५ मुलगा पांच वर्षांहून मोठा व वीस वर्षांहून लहान
असला तर त्याचें मोल वीस शेकेल व मुलीचें दहा
शेकेल असावें; ६ आणि मुलगा एक महिन्याहून मोठा व
पांच वर्षांहून लहान असला तर त्याचें मोल पांच शेकेल
व मुलगी असली तर तीन शेकेल असावें; ७ पुरुष साठ
वर्षांहून अधिक वयाचा असला तर त्याचें मोल पंधरा
शेकेल व स्त्री असल्यास दहा शेकेल असावें; ८ पण
कोणी इतका कंगाल असला कीं तूं ठरविलेले दाम
त्यास देतां आले नाहींत तर त्यानें याजकापुढें
उभें राहावें. आणि याजकानें त्याचे दाम ठरवावे;
नवस करणाऱ्याची शक्ति असेल त्याप्रमाणें याजकानें
मोल ठरवावें.

९ लोक परमेश्वराला जे पशु अर्पण करीत असतात
त्यांपैकीं एकाद्या पशूचा नवस केला तर परमे-
श्वरास अर्पावयाचा तो पशु पवित्र समजावा,
१० त्यानें तो बिलकूल बदलूं नये, म्हणजे वाइटाबद्दल
बरा किंवा बऱ्याबद्दल वाईट असा बदल त्यानें करूं
नये, त्यानें एका पशूबद्दल दुसरा दिलाच तर तो व
त्याच्याबद्दल दिलेला हे दोन्ही पवित्र समजावे.
११ लोक परमेश्वराला अर्पीत नाहींत असल्या अशुद्ध
पशूंपैकीं तो असला तर तो याजकापुढें उभा करावा;
१२ त्या पशूचे गुणावगुण पाहून त्याचें मोल याजकानें
ठरवावें; तूं ठरविशील तितकें त्याचें मोल समजावें.
१३ नवस करणारा कांहीं मोल देऊन तो सोडवील
तर याजकानें ठरविलेल्या मोलांत आणखी एक
पंचमांश भर घालून तें त्यानें द्यावें.

१४ कोणीं आपलें घर पवित्र करून परमेश्वराला
वाहिलें तर याजकानें त्या घराचे गुणावगुण पाहून
त्याचें मोल ठरवावें; याजक ठरवील तेवढें त्याचें
मोल समजावें. १५ घर पवित्र करून वाहणारा
मोल देऊन तें सोडवूं पाहील तर तूं ठरविलेल्या
मोलांत एक पंचमांश भर घालून त्यानें तें द्यावें
म्हणजे घर त्याचें होईल.

१६ आपल्या वतनाच्या जमिनीचा कांहीं भाग जर
कोणी पवित्र करून परमेश्वराला वाहील, तर त्यांत
बियाणें पडेल त्या मानानें तूं त्याचें मोल ठरवावें; एक
होमरभर जवांची पेरणी त्यांत होत असली तर त्या
शेताचें मोल पन्नास शेकेल ठरवावें. १७ योबेल वर्षी
तें पवित्र ठेवण्यांत आलें तरीहि तूं ठरविशील
त्याप्रमाणें त्याचें मोल व्हावें, १८ योबेल झाल्यावर
जर कोणी आपलें शेत पवित्र करूं पाहील तर दुसऱ्या
योबेल वर्षाला जितकीं वर्षें असतील त्या मानानें
याजकानें त्याचे तेवढे पैसे ठरवावे; तुझ्या अंदाजांतून
तेवढे पैसे कमी करावे. १९ शेत पवित्र करून
ठेवणारा आपलें शेत सोडवूं पाहील तर तूं
ठरविलेल्या मोलांत आणखी एक पंचमांश भर घालून
त्यानें तें द्यावें म्हणजे शेत त्याचें ठरेल. २० त्यानें तें
शेत सोडविलें नाहीं किंवा दुसऱ्या कोणास विकिलें
असेल तर मग तें यापुढें सोडवून घेतां यावयाचें नाहीं;
२१ तर योबेल वर्षी तें शेत सुटेल तेव्हां पूर्णपणें
समर्पित केलेल्या शेताप्रमाणें परमेश्वराप्रीत्यर्थ तें पवित्र
ठरेल अर्थात् तें याजकाचें वतन होईल. २२ दुसऱ्या-
कडून खरेदी केलेलें व स्वतांच्या वतनांतलें नसलेलें
असें शेत कोणी परमेश्वराप्रीत्यर्थ पवित्र करूं इच्छील
२३ तर याजक योबेल वर्षापर्यंत त्याचा हिशोब करील
आणि जितकें मोल तूं ठरविशील तितकें परमेश्वराप्रीत्यर्थ
पवित्र समजून त्याच दिवशीं त्यानें देऊन टाकावें.
२४ ज्याच्यापासून तें आरंभीं खरेदी केलें असेल,
म्हणजे ज्याच्या वतनापैकीं तें असेल त्याच्या ताब्यांत
तें योबेल वर्षी पुनः जावें. २५ ज्याचें मोल तूं
ठरविशील तें पवित्रस्थानांतल्या चलनाप्रमाणें ठरवावें;
शेकेल म्हणजे वीस गेरा.

२६ ग्रामपशूंपैकीं प्रथम वत्स परमेश्वराचा ठरलेला
आहे; त्यास कोणीं पवित्र करून वाहूं नये; तो गुरांढोरां-
पैकीं असो किंवा शेरडांमेंढरांपैकीं असो, तो परमेश्वराचाच
आहे. २७ तो वत्स अशुद्ध पशूचा असला तर त्यानें

तुझ्या ठरावाप्रमाणें जें मोल होईल त्यांत एक पंचमांश
भर घालून पाहिजे तर तो सोडवावा; पण तो सोडवीत
नसला तर तूं ठरविलेल्या किंमतीस तो विकून टाकावा.

२८ तथापि कोणीं आपल्या सर्वस्वापैकीं जें कांहीं
परमेश्वराला वाहिलें असेल, मग तो मनुष्य असो,
पशु असो किंवा त्याच्या वतनांतील शेत असो, तें
विकूं नये किंवा सोडवूं नये; जें कांहीं वाहिलें असेल
तें परमेश्वराप्रीत्यर्थ परमपवित्र समजावें. २९ एखाद्या
मनुष्यास वाहिलें असलें तर त्याला सोडवून घेतां येणार
नाहीं; त्याचा वधच केला पाहिजे.

३० भूमीच्या उत्पन्नाचा दशमांश परमेश्वराचा
आहे. मग तें जमिनींचें धान्य असो अथवा झाडांचीं
फळें असोत; तें परमेश्वराप्रीत्यर्थ पवित्र होय.
३१ आपल्या दिलेल्या दशमांशापैकीं कांहीं त्यास दाम
देऊन सोडविण्याची इच्छा असल्यास त्यांत त्यानें एक
पंचमांशाची भर घालून तें सोडवावें. ३२ गुरेंढोरें
अथवा शेरडेंमेंढरें यांपैकीं ज्यांची गणना काठीखालून
चालवून होते अशा प्रत्येक दहांपैकीं एकएक पशु परमे-
श्वराप्रीत्यर्थ पवित्र असावा. ३३ कोणीं त्याचे गुणाव-
गुण पाहूं नयेत किंवा त्यास बदलूं नये; कोणीं त्यास
बदलिलेंच तर तो व त्याचा बदला हे दोन्ही पवित्र
समजावे; खंड देऊन ते सोडवितां यावयाचे नाहींत.

३४ ज्या आज्ञा परमेश्वरानें इस्राएल लोकांसाठीं
सीनाय पर्वतापाशीं मोशाला दिल्या त्या ह्याच होत.

# गणना



१ इस्राएल लोक मिसर देशांतून निघाल्यावर
**१** दुसऱ्या वर्षाच्या दुसऱ्या महिन्याच्या प्रतिपदेस
परमेश्वरानें सीनायच्या रानांत दर्शनमंडपांत
मोशाला सांगितलें तें असें: २ इस्राएल लोकांच्या
सगळ्या मंडळीची गणती कर; त्यांचीं कुळें आणि
त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून प्रत्येक पुरुष
नांवाप्रमाणें मोजून त्यांची शिरगणती कर; ३ जितके
इस्राएल वीस वर्षांचे किंवा त्यांहून अधिक वयाचे
युद्धास लायक असतील त्या सर्वांचीं त्यांच्या दळाप्रमाणें
तूं आणि अहरोन मिळून गणती करा. ४ प्रत्येक
वंशांतला एकएक पुरुष म्हणजे जो आपल्या पूर्वजांच्या
घराण्यांतला प्रमुख असेल त्यास आपल्याबरोबर घ्या.
५ तुमच्याबरोबर जे असावयाचे त्यांचीं नांवें हीं:
रऊबेन वंशांतला शदेयुराचा पुत्र अलीसूर;
६ शिमोनाच्या वंशांतला सुरीशादैचा पुत्र शलमीयेल;
७ यहूदा वंशांतला आम्मीनादाबाचा पुत्र नहशोन;
८ इस्साखार वंशांतला सुवाराचा पुत्र नथनेल;
९ जबुलून वंशांतला हेलोनाचा पुत्र अलीयाब;
१० योसेफपुत्रांच्या वंशांत म्हणजे एफ्राइमाच्या
वंशांतला आम्मीहूदाचा पुत्र अलीशामा, आणि मन-
श्शाच्या वंशांतला पदाहसुराचा पुत्र गमलीयेल;
११ बन्यामीन वंशांतला गिदोनीचा पुत्र अबीदान;
१२ दान वंशांतला आम्मीशाद्दैचा पुत्र अहीएजर;
१३ आशेर वंशांतला आक्रानाचा पुत्र पागीयेल;
१४ गाद वंशांतला दगुवेलाचा पुत्र एल्यासाप;
१५ नफताली वंशांतला एनानाचा पुत्र अहीरा;
१६ मंडळींतून जे पुरुष निवडिले ते हे; ते आपआपल्या
पूर्वजांच्या वंशांचे सरदार असून हजारहजार
इस्राएलांच्या पथकांचे प्रमुख होते. १७ ज्यांचीं नांवें
वर नमूद केलीं त्यांस मोशे व अहरोन यांनीं बरोबर

घेऊन १८ दुसऱ्या महिन्याच्या प्रतिपदेस सर्व मंडळी जमविली; तेव्हां इस्राएल लोकांनीं आपआपलें कुळ व आपआपल्या पूर्वजांचें घराणें यांस अनुसरून वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे जे होते त्यांची शिरगणती करून आपल्या नांवांच्या अनुक्रमें आपली वंशावळ सांगितली. १९. परमेश्वरानें मोशाला आज्ञा दिली होती त्याप्रमाणें त्यानें सीनाय रानांत त्यांची गणना केली.

२० इस्राएलाचा ज्येष्ठ पुत्र जो रऊबेन त्याच्या वंशाचे लोक म्हणजे त्यांचीं कुळें व त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून जितके पुरुष वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे असून युद्ध करण्यास लायक होते त्या सर्वांची नोंद त्यांच्या नांवांच्या अनुक्रमानें त्यानें केली; २१ रऊबेन वंशांतील लोकांची जी मोजदाद केली ती शेचाळीस हजार पांचशें भरली.

२२ शिमोनाच्या वंशांतील लोक म्हणजे त्यांचीं कुळें व त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून जितके पुरुष वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे असून युद्ध करण्यास लायक होते त्या सर्वांची नोंद त्यांच्या नांवांच्या अनुक्रमानें करण्यांत आली; २३ शिमोन वंशांतल्या लोकांची मोजदाद केली ती एकुणसाठ हजार तीनशें भरली.

२४ गाद वंशांतील लोक म्हणजे त्यांचीं कुळें व त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून जितके पुरुष वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे असून युद्ध करण्यास लायक होते त्या सर्वांची नोंद त्यांच्या नांवांच्या अनुक्रमानें करण्यांत आली; २५ गाद वंशांतील लोकांची मोजदाद केली ती पंचेचाळीस हजार सहाशें पन्नास भरली.

२६ यहूदा वंशांतील लोक म्हणजे त्यांचीं कुळें व त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून जितके पुरुष वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे असून युद्ध करण्यास लायक होते त्या सर्वांची नोंद त्यांच्या नांवांच्या अनुक्रमानें केली; २७ यहूदा वंशांतील लोकांची मोजदाद केली ती चौऱ्याहत्तर हजार सहाशें भरली.

२८ इस्साखार वंशांतील लोक म्हणजे त्यांचीं कुळें व त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून जितके पुरुष वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे असून युद्ध करण्यास लायक होते त्या सर्वांची नोंद त्यांच्या नांवांच्या अनुक्रमानें केली; २९ इस्साखार वंशांतील लोकांची मोजदाद केली ती चौपन्न हजार चारशें भरली.

३० जबुलून वंशांतील लोक म्हणजे त्यांचीं कुळें व त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून जितके पुरुष वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे असून युद्ध करण्यास लायक होते त्या सर्वांची नोंद त्यांच्या नांवांच्या अनुक्रमानें केली; ३१ जबुलून वंशांतील लोकांची मोजदाद केली ती सत्तावन्न हजार चारशें भरली.

३२ योसेफाच्या पुत्रांपैकीं एफ्राइमाच्या वंशांतील लोक म्हणजे त्यांचीं कुळें व त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून जितके पुरुष वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे असून युद्ध करण्यास लायक होते त्या सर्वांची नोंद त्यांच्या नांवांच्या अनुक्रमानें केली; ३३ एफ्राइमाच्या वंशांतील लोकांची मोजदाद केली ती चाळीस हजार पांचशें भरली.

३४ मनश्शाच्या वंशांतील लोक म्हणजे त्यांचीं कुळें व त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून जितके पुरुष वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे असून युद्ध करण्यास लायक होते त्या सर्वांची नोंद त्यांच्या नांवांच्या अनुक्रमानें केली; ३५ मनश्शाच्या वंशांतील लोकांची मोजदाद केली ती बत्तीस हजार दोनशें भरली.

३६ बन्यामीन वंशांतील लोक म्हणजे त्यांचीं कुळें व त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून जितके पुरुष वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे असून युद्ध करण्यास लायक होते त्या सर्वांची नोंद त्यांच्या नांवांच्या अनुक्रमानें केली; ३७ बन्यामीन वंशांतील लोकांची मोजदाद केली ती पस्तीस हजार चारशें भरली.

३८ दान वंशांतील लोक म्हणजे त्यांचीं कुळें व त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून जितके पुरुष वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे असून युद्ध

करण्यास लायक होते त्या सर्वांची नोंद त्यांच्या नांवांच्या अनुक्रमानें केली; ३९ दान वंशांतील लोकांची मोजदाद केली ती बासष्ट हजार सातशें भरली.

४० आशेर वंशांतील लोक म्हणजे त्यांचीं कुळें व त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून जितके पुरुष वीस वर्षांचे व त्यांहून अधिक वयाचे असून युद्ध करण्यास लायक होते त्या सर्वांची नोंद त्यांच्या नांवांच्या अनुक्रमानें केली; ४१ आशेर वंशांतील लोकांची मोजदाद केली ती एकेचाळीस हजार पांचशें भरली.

४२ नफताली वंशांतील लोक म्हणजे त्यांचीं कुळें व त्यांच्या वडिलांचीं घराणीं यांस अनुसरून जितके पुरुष वीस वर्षांचे व त्यांहून अधिक वयाचे असून युद्ध करण्यास लायक होते त्या सर्वांची नोंद त्यांच्या नांवांच्या अनुक्रमानें केली; ४३ नफताली वंशांतील लोकांची मोजदाद केली ती त्रेपन्न हजार चारशें भरली.

४४ मोशे आणि अहरोन आणि इस्राएलाचे बारा सरदार जे आपआपल्या वडिलांच्या घराण्याचे प्रमुख होते त्यांनीं गणती केली ती इतकी भरली, ४५ या प्रकारें इस्राएल लोकांपैकीं त्यांच्या वडिलांच्या घराण्यांप्रमाणें वीस वर्षांचा व त्यांहून अधिक वयाचे युद्धास लायक होते त्या सर्वांची नोंद झाली, ४६ ती एकंदर सहा लक्ष तीन हजार पांचशें पन्नास भरली.

४७ लेव्यांची इतरांबरोबर त्यांच्या वडिलांच्या वंशाप्रमाणें नोंद करण्यांत आली नाहीं. ४८ कारण परमेश्वरानें मोशाला सांगितलें होतें कीं ४९ इस्राएल लोकांपैकीं फक्त लेवी वंशाची गणती करूं नये; इस्राएल लोकांच्या गणतींत त्यांचा समावेश करूं नये; ५० तर आज्ञापटाच्या निवासमंडपावर, त्यांतील सर्व सामानावर व त्यासंबंधानें जें कांहीं असेल त्यावर लेव्यांस अधिकारी नेमून ठेव; निवासमंडप आणि त्यांतलें सर्व सामान हें त्यांनीं वाहून न्यावें, त्यांतच त्यांनीं सेवा करावी व आपले डेरे निवासमंडपासभोंवार द्यावे. ५१ निवासमंडप पुढें न्यावयाचा असेल तेव्हां लेव्यांनींच तो मोडावा; आणि तो उभा करावयाचा असेल तेव्हां लेव्यांनींच तो उभा करावा; कोणी परका जवळ आला तर त्यास जिवें मारावें. ५२ इस्राएल लोकांनीं आपआपले डेरे आपआपल्या दळानुसार आपआपल्या छावणींत आपल्या निशाणापाशीं ठोकावे; ५३ पण लेव्यांनीं आपले डेरे आज्ञापटाच्या निवासमंडपासभोवतीं ठोकावे म्हणजे इस्राएल लोकांच्या मंडळीवर कोप व्हावयाचा नाहीं, आणि लेव्यांनीं आज्ञापटाच्या निवासमंडपाचें रक्षण करावें. ५४ इस्राएल लोकांनीं याप्रमाणें केलें; परमेश्वरानें मोशाला आज्ञा केल्याप्रमाणें त्यांनीं सर्व कांहीं केलें.

२ १ परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस सांगितलें: २ दर्शनमंडपाजवळ सभोंवार आपआपल्या निशाणाजवळ व आपआपल्या पूर्वजांच्या घराण्याच्या ध्वजेजवळ इस्राएल लोकांनीं आपले डेरे द्यावे. ३ पूर्वेस उगवतीकडे ज्यांच्या दळांप्रमाणें डेरे द्यावयाचे ते यहूदाच्या छावणींतील निशाणाचे लोक असावे; त्यांचा सरदार आम्मीनादाबाचा पुत्र नहशोन हा असावा. ४ त्यांच्या दळाची मोजदाद केली ती चौऱ्याहत्तर हजार सहाशें होती. ५ त्यांच्या शेजारीं ज्यांनीं डेरे द्यावयाचे ते इस्साखार वंशांतले असावे; इस्साखार वंशाचा सरदार सुवाराचा पुत्र नथनेल हा असावा; ६ त्यांच्या दळाची मोजदाद केली ती चौपन्न हजार चारशें होती; ७ त्यांच्यापुढें जबुलून वंशांतील लोकांनीं राहावें; जबुलून वंशाचा सरदार हेलोनाचा पुत्र अलियाब हा असावा; ८ त्यांच्या दळाची मोजदाद केली ती सत्तावन्न हजार चारशें होती. ९ या प्रकारें यहूदा वंशाच्या छावणींत त्यांच्या त्यांच्या दळांप्रमाणें त्यांची मोजदाद केली, तीप्रमाणें ते एक लक्ष शायशीं हजार चारशें होते. कूच करतांना यांनींच अग्रभागीं चालावें.

१० दक्षिण बाजूस रऊबेन वंशाच्या छावणीचें निशाण लावावें; या वंशांतील लोकांनीं आपआपल्या दळांप्रमाणें राहावें; रऊबेन वंशाचा सरदार शदेउराचा पुत्र अलीसूर हा असावा. ११ त्यांच्या दळाची मोजदाद केली ती शेचाळीस हजार पांचशें होती. १२ त्यांच्या-

शेजारीं शिमोनाच्या वंशजांचे डेरे द्यावे, आणि शिमोन वंशाचा सरदार सुरीशाद्दैचा पुत्र शलुमीयेल हा असावा; १३ त्यांच्या दळाची मोजदाद केली ती एकुणसाठ हजार तीनशें होती. १४ त्यांच्या शेजारीं गाद वंशाच्या लोकांनीं राहावें, आणि गाद वंशाचा सरदार रगुवेलाचा पुत्र एल्यासाप हा असावा; १५ त्यांच्या दळाची मोजदाद केली ती पंचेचाळीस हजार सहाशें पन्नास होती. १६ या प्रकारें रऊबेन वंशाच्या छावणींत त्यांच्यात्यांच्या दळांप्रमाणें त्यांची मोजदाद केली ती एक लक्ष एकावन्न हजार चारशें पन्नास होती. कूच करतांना त्यांची रांग दुसरी असावी.

१७ कूच करितांना त्यांच्यामागें आणि सर्व छावण्यांच्या मध्यभागीं लेव्यांची छावणी आणि दर्शन-मंडप असावा; ज्या क्रमानें ते डेरे देतील त्याच क्रमानें त्यांनीं आपआपल्या जागीं आपआपल्या निशाणांजवळ राहून कूच करावें.

१८ पश्चिम बाजूस एफ्राइमाच्या छावणीचें निशाण लावावें आणि आम्मीहुदाचा पुत्र अलीशामा हा एफ्राइमाच्या वंशाचा सरदार असावा. १९ त्याच्या दळाची मोजदाद केली ती चाळीस हजार पांचशें होती. २० त्याच्या शेजारीं मनश्शाच्या वंशजांनीं डेरे द्यावे आणि मनश्शाच्या वंशाचा सरदार पदासुराचा पुत्र गमलीयेल हा असावा; २१ त्यांच्या दळाची मोजदाद केली ती बत्तीस हजार दोनशें होती; २२ त्याच्या शेजारीं बन्यामीन वंशांतल्या लोकांनीं राहावें, व बन्यामीन वंशाचा सरदार गिदोनीचा पुत्र अबीदान हा असावा; २३ त्यांच्या दळाची मोजदाद केली ती पस्तीस हजार चारशें होती. २४ या प्रकारें एफ्राईम वंशाच्या छावणींत त्यांच्या त्यांच्या दळांप्रमाणें त्यांची मोजदाद केली ती एक लक्ष आठ हजार शंभर भरली. कूच करितांना त्यांची रांग तिसरी असावी.

२५ उत्तर बाजूस दान वंशाच्या छावणीचें निशाण लावावें आणि आम्मीशाद्दैचा पुत्र अहीयेजर हा दान वंशाचा सरदार असावा. २६ त्याच्या दळाची मोजदाद केली ती बासष्ट हजार सातशें होती. २७ त्याच्या शेजारीं आशेरच्या वंशजांनीं डेरे द्यावे, आणि आशेर वंशाचा सरदार आक्रानाचा पुत्र पागीयेल हा असावा. २८ त्यांच्या दळाची मोजदाद केली ती एकेचाळीस हजार पांचशें होती; २९ त्यांच्या शेजारीं नफताली वंशांतल्या लोकांनीं राहावें आणि नफताली वंशाचा सरदार एनानाचा पुत्र अहीरा हा असावा; ३० त्यांच्या दळाची मोजदाद केली ती त्रेपन्न हजार चारशें होती; ३१ या प्रकारें दान वंशाच्या छावणींत त्यांच्या त्यांच्या दळांप्रमाणें त्यांची मोजदाद केली ती एक लक्ष सत्तावन्न हजार सहाशें होती. यांनीं आपलीं निशाणें घेऊन सर्वांच्या पिछाडीस चालावें.

३२ इस्राएल वंशांतल्या ज्या लोकांची त्यांच्या त्यांच्या घराण्यांप्रमाणें मोजदाद झाली ती ही; त्यांच्या छावण्यांतील त्यांच्या त्यांच्या दळांप्रमाणें ज्या सर्वांची मोजदाद करण्यांत आली त्यांची संख्या एकंदर सहा लक्ष तीन हजार पांचशें पन्नास होती; ३३ पण परमेश्वरानें मोशाला आज्ञा दिली होती तीप्रमाणें लेवी वंशाची इस्राएल लोकांबरोबर गणती केली नाहीं. ३४ त्याप्रमाणें इस्राएल लोकांनीं केलें; परमेश्वरानें मोशाला आज्ञा केल्याप्रमाणें इस्राएल लोक आपआपलीं कुळें व आपआपल्या वडिलांचीं घराणीं यांच्या अनुक्रमानें आपआपल्या निशाणापाशीं डेरे देत आणि कूच करीत.

३ १ परमेश्वर सीनाय पर्वताजवळ मोशाशीं बोलला त्या काळची अहरोन व मोशे यांची वंशावळ ही:
२ अहरोनाच्या पुत्रांचीं नांवें येणेंप्रमाणें: ज्येष्ठ पुत्र नादाब, अबीहू, एलाजार व इथामार. ३ अहरोनाचे पुत्र अभिषिक्त याजक होते व याजकाच्या नात्यानें सेवा करण्यासाठीं त्यानें त्यांस दीक्षा दिली होती; त्यांचीं नांवें हींच होत. ४ नादाब व अबीहू यांनीं सीनाय रानांत परमेश्वरासमोर अशास्त्रोक्त अग्नि अर्पिल्यावरून ते परमेश्वरासमोर मृत्यु पावले; त्यांस कांहीं संतति नव्हती, म्हणून एलाजार व इथामार हे आपला बाप अहरोन याजबरोबर याजकपण करीत असत.

५ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, ६ लेवी वंशांतील

लोकांस समीप आणून अहरोन याजकासमोर उभें कर;
त्यांनीं त्याजबरोबर सेवा करावी. ७ अहरोन व सर्व
मंडळी त्यांस जें कांहीं काम निवासमंडपाच्या सेवे-
संबंधानें सोपितील तें त्यांनीं दर्शनमंडपासमोर करावें.
८ दर्शनमंडपांतील सर्व सामानाचें आणि निवास-
मंडपाच्या सेवेसंबंधानें जें कांहीं इस्राएल लोक त्यांच्या
स्वाधीन करितील त्यांचें त्यांनीं रक्षण करावें. ९ तूं लेवी
वंशांतील लोकांस अहरोन व त्याचे पुत्र यांच्या हवालीं
कर; इस्राएल लोकांच्या तर्फे ते अहरोनास पूर्णपणें
समर्पण केले आहेत. १० अहरोन व त्याचे पुत्र यांची
नेमणूक कर म्हणजे ते आपलें याजकपण संभाळतील;
कोणी परका मनुष्य त्यांच्याजवळ आला तर त्यास
जिवें मारावें

११ परमेश्वरानें मोशाला सांगितलें कीं १२ पाहा,
इस्राएलाच्या पोटीं प्रथम जन्मलेल्यांच्या ऐवजीं मीं
इस्राएल लोकांतून लेवी वंशास घेतलें आहे; हे लेवी
वंशांतील लोक माझे होत; १३ सर्व प्रथम जन्मलेले
माझे, कारण ज्या दिवशीं मिसर देशांतील सर्व प्रथम
जन्मलेले मीं मारून टाकिले त्याच दिवशीं इस्राएल
लोकांतील मनुष्य अगर पशु यांचे सर्व प्रथम जन्मलेले
मीं आपणासाठीं पवित्र ठरविले, त्या अर्थी ते माझेच
होत; मी परमेश्वर आहें.

१४ परमेश्वरानें सीनाय रानांत मोशाला सांगितलें कीं
१५ लेवी वंशांतले जितके पुरुष एका महिन्याचे अथवा
त्याहून अधिक वयाचे असतील त्यांचीं त्यांचीं पितृ-
कुळें व त्यांचीं घराणीं यांस अनुसरून गणती कर.
१६ परमेश्वरानें मोशाला ही अशी आज्ञा केली तीप्रमाणें
त्यानें त्यांची गणती केली. १७ लेवीच्या पुत्रांचीं नांवें
हीं: गेर्षोन, कहाथ व मरारी. १८ गेर्षोनाच्या पुत्रांचीं
नांवें त्यांच्या कुळांप्रमाणें हीं: लिब्नी व शिमी.
१९ कहाथाच्या कुळांप्रमाणें त्याचे पुत्र: अम्राम,
इसहार, हेब्रोन व उजीयेल. २० मरारीच्या कुळां-
प्रमाणें त्याचे पुत्र: माहली व मूशी. लेव्यांचीं त्यांच्या
पितृकुळांप्रमाणें हीं घराणीं होत.

२१ गेर्षोनापासून लिब्नी व शिमी हीं कुळें चालू
झालीं; गेर्षोन वंशाचीं कुळें हीं. २२ त्यांच्यापैकीं
जितके पुरुष एक महिन्याचे व त्याहून अधिक वयाचे
होते त्या सर्वांची संख्या सात हजार पांचशें भरली.
२३ गेर्षोन कुळांतल्या लोकांनीं निवासमंडपाच्या मागें
पश्चिमेस आपले डेरे द्यावे. २४ गेर्षोन वंशाच्या
पितृकुळाचा सरदार लायेलाचा पुत्र एल्यासाप हा
असावा. २५ दर्शनमंडपांतील ज्या वस्तु गेर्षोन
कुळांतल्या मनुष्याच्या हवालीं केल्या जाव्या त्या ह्या:
निवासमंडप, तंबू, त्यावरील आच्छादन व दर्शन-
मंडपाच्या दाराचा पडदा, २६ निवासमंडप आणि
वेदी यांच्या सभोवार असलेल्या अंगणाचे पडदे,
अंगणाच्या दाराचा पडदा आणि त्यांतील सर्व सामानास
लागणाऱ्या दोऱ्या.

२७ कहाथापासून अम्राम, इसहार, हेब्रोन व
उजीएल हीं कुळें चालू झालीं; कहाथ वंशाचीं कुळें
हींच. २८ त्यांच्यापैकीं जे पुरुष एक महिन्याचे व
त्याहून अधिक वयाचे होते ते आठ हजार सहाशें
भरले; पवित्रस्थानाचें रक्षण करावयाचें काम
त्यांच्याकडे असे. २९ कहाथी कुळाच्या लोकांनीं
आपले डेरे निवासमंडपाच्या दक्षिण दिशेस द्यावे.
३० कहाथी वंशाच्या पितृकुळांचा सरदार उजीयेलाचा
पुत्र अलीसापान हा असावा. ३१ कोश, मेज,
दीपवृक्ष, वेदी आणि पवित्रस्थानांत सेवेसाठीं असलेलीं
पात्रें व पडदा हीं त्यांच्या स्वाधीन करावीं व
त्यांच्या निगेचें काम त्यांकडे सोपावें. ३२ लेव्यांच्या
सरदारांचा सरदार अहरोनाचा पुत्र एलाजार हा
असावा; पवित्रस्थानाच्या वस्तूंचें रक्षण करण्याचें काम
ज्यांकडे सोपलें आहे त्यांजवर त्याची देखरेख असावी.

३३ मरारीपासून माहली व मूशी हीं कुळें चालू
झालीं; मरारीचीं कुळें हीं. ३४ त्यांच्यांतले जे पुरुष
एक महिन्याचे व त्याहून अधिक वयाचे होते ते सहा
हजार दोनशें भरले. ३५ मरारी वंशाच्या पितृ-
कुळाचा सरदार अबीहाईलाचा पुत्र सूरीएल हा
असावा; या कुळांतल्या लोकांनीं निवासमंडपाच्या
उत्तरेस आपले डेरे द्यावे. ३६ त्यांच्या स्वाधीन ज्या

वस्तु करावयाच्या त्या ह्या: निवासमंडपाच्या फळ्या व
त्यांचे अडसर, खांब, खुरच्या व त्यांचें सर्व उपकरण-
साहित्य हीं त्यांच्या स्वाधीन करावीं व त्यांच्या निगेचें
काम त्यांकडे सोपावें; ३७ आणखी सभोवतालच्या
अंगणाचे खांब आणि त्यांच्या खुरच्या, खुंट्या आणि
दोऱ्या हीं त्यांच्या स्वाधीन करावीं. ३८ निवास-
मंडपाच्या समोर म्हणजे उगवतीस जे डेरे
द्यावयाचे ते मोशे आणि अहरोन व त्यांचे पुत्र यांचे
असावे; पवित्रस्थानाचें रक्षण करण्याचें जें काम
इस्राएल लोकांकडे सोपलें होतें तें त्यांनीं करावें; परका
कोणी समीप आला तर त्याला मारून टाकावें.
३९ परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें लेवी वंशांतील प्रत्येक
कुळाची जी गणती मोशे व अहरोन यांनीं केली
तीप्रमाणें एका महिन्याचे व त्याहून अधिक वयाचे पुरुष
बावीस हजार भरले.

४० मग परमेश्वर मोशाला म्हणाला, इस्राएल
लोकांपैकीं जितके प्रथम जन्मलेले एका महिन्याचे व
त्याहून अधिक वयाचे पुरुष असतील त्यांच्या नांवांची
गणती कर. ४१ इस्राएल लोकांच्या सर्व प्रथम
जन्मलेल्यांच्या ऐवजीं लेवी वंश मजप्रीत्यर्थ घे;
मी परमेश्वर आहें; आणि इस्राएल लोकांच्या पशूंच्या
सर्व प्रथम वत्सांच्या ऐवजीं लेव्यांचे पशु घे. ४२
परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें मोशानें इस्राएलाच्या सर्व
प्रथम जन्मलेल्यांची गणती केली. ४३ सर्व प्रथम
जन्मलेले पुरुष जे एक महिन्याचे व त्याहून अधिक
वयाचे होते त्यांच्या नांवांची संख्या बावीस हजार
दोनशें ब्याहत्तर भरली.

४४ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, ४५ इस्रा-
एलाच्या सर्व प्रथम जन्मलेल्यांच्या ऐवजीं लेवी, आणि
त्यांच्या पशूंच्या ऐवजीं लेव्यांचे पशु घे; लेवी हे माझे होत;
मी परमेश्वर आहें. ४६ इस्राएलाचे प्रथम जन्मलेले
पुरुष लेव्यांच्या संख्येहून दोनशें ब्याहत्तर अधिक
आहेत त्यांस खंड देऊन सोडवावें म्हणून ४७ पुरुषा-
मागें पांच शेकेल खंड द्यावा; पवित्रस्थानांतल्या चलना-
प्रमाणें ते घ्यावे (शेकेल म्हणजे वीस गेरा); ४८ ह्या
अधिक असलेल्या प्रथम जन्मलेल्यांच्या खंडाचे जे रुपये
येतील ते अहरोन व त्याचे पुत्र यांस द्यावे
४९ लेव्यांच्या योगें इस्राएलांचे प्रथम जन्मलेले सुटले
त्यांखेरीज राहिलेल्यांपासून मोशानें खंडाचे रुपये
घेतले; ५० त्यांच्यापासून जी रकम घेतली ती
पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एक हजार तीनशें पासष्ट
शेकेल होती; ५१ परमेश्वरानें मोशाला आज्ञा दिली
होती तिच्याप्रमाणें त्यानें हे खंडाचे पैसे अहरोन व त्याचे
पुत्र यांस दिले.

१ परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस सांगितलें,
**४** २ लेवीच्या पुत्रांपैकीं कहाथवंशजांची, त्यांचीं घराणीं
व त्यांचीं पितृकुलें यांस अनुसरून, गणती कर;
३ तीस वर्षांच्या वयापासून पन्नास वर्षांपर्यंतचे जे
पुरुष दर्शनमंडपाच्या सेवेंत दाखल होतात त्यांची
गणती कर. ४ दर्शनमंडपांतील परमपवित्र वस्तूंसंबंधानें
कहाथवंशजांनीं सेवा करावयाची ती ही: ५ छावणीचें
कूच होईल तेव्हां अहरोन व त्याचे पुत्र यांनीं आंत
जाऊन अंतरपट खालीं काढावा व त्यानें आज्ञापटाचा
कोश झाकावा; ६ मग त्यांनीं त्यावर तहशाच्या[1]
कातड्याचें आच्छादन घालावें; त्या सर्वांवर त्यांनीं निळ्या
रंगाचें कापड पसरावें; आणि कोशास त्याच्या काठ्या
बसवाव्या. ७ समर्पित केलेल्या भाकरीच्या मेजावर त्यांनीं
निळ्या रंगाचें कापड पसरून त्यावर तबकें, धुपाटणीं,
कटोरे व पेयार्पणाचीं पात्रें ठेवावीं; सततची भाकरहि
त्यावर ठेवावी; ८ मग त्यांनीं त्यावर किरमिजी रंगाचें
कापड पसरून त्यावर तहशाच्या कातड्याचें आच्छादन
घालावें आणि मेजाला काठ्या बसवाव्या; ९ आणि
त्यांनीं निळ्या रंगाचें कापड घेऊन दीपवृक्ष, त्यावरले
दिवे, चिमटे, गुलदानें आणि सेवेच्या कामीं पडणारीं
तेलाचीं सर्व पात्रें हीं झाकावीं; १० दीपवृक्ष व त्याचें
सगळें साहित्य यांवर तहशाच्या कातड्याचें आच्छादन
घालून तीं सर्व नवघणाला बांधावीं. ११ मग सोन्याच्या
वेदीवर त्यांनीं निळ्या रंगाचें वस्त्र पसरून वर तहशाच्या
कातड्याचें आच्छादन घालावें आणि तिच्या काठ्या तिला

१ एका जातीचें जनावर.

बसवाव्या; १२ पवित्रस्थानांतील सर्व सेवासाहित्य
निळ्या रंगाच्या कापडांत गुंडाळून त्यावर तहशाच्या
कातड्याचें आच्छादन घालावें व तें सर्व नवघणाला
बांधावें. १३ मग त्यांनीं वेदीवरील सर्व राख काढून
तिच्यावर जांभळ्या रंगाचें कापड पसरावें; १४ आणि
वेदीच्या सेवेचीं उपकरणें म्हणजे धुपाटणीं, आंकडे,
पावडी, कटोरे आदिकरून वेदीचें सर्व सामान तिजवर
ठेवावें आणि वरून तहशाच्या कातड्याचें आच्छादन
घालावें आणि तिला तिच्या काठ्या बसवाव्या.
१५ छावणीचें कूच होईल त्या वेळीं अहरोन व त्याचे
पुत्र यांनीं पवित्रस्थान व त्यांतील सर्व सामान यांस
आच्छादन घालण्याचें संपविल्यावर कहाथी यांनीं तें
सर्व उचलून न्यावयास यावें, तथापि त्यांनीं कोणत्याहि
पवित्र वस्तूला स्पर्श करूं नये, केला तर ते मरतील.
मंडपांतलीं हीं ओझीं कहाथ्यांनीं वाहावयाचीं.
१६ अहरोन याजकाचा पुत्र एलाजार यास जें काम
सोपून द्यावयाचें तें हें: दिव्याचें तेल, सुगंधी धूप,
निरंतरचा अन्नबलि, अभिषेकाचें तेल, निवास-
मंडप व त्यांतलें सर्व सामान आणि पवित्रस्थान
व त्यांतलें सर्व सामान यांचें रक्षण त्यानें करावें.

१७ परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस सांगितलें,
१८ कहाथी वंशांतल्या कुळांचा लेख्यांतून उच्छेद होऊं
देऊं नये; १९ त्यांचें असें करावें कीं जेव्हां ते परम-
पवित्र वस्तूसमीप येतील तेव्हां त्यांनीं मरूं नये, तर
जगावें म्हणून अहरोन व त्याचे पुत्र यांनीं आंत येऊन
त्यांतल्या एकेकाला त्याचेंत्याचें काम व ओझें नेमून
द्यावें; २० पण पवित्र वस्तु पाहण्यासाठीं त्यांनीं
क्षणभरहि आंत जाऊं नये, ते गेले तर मरतील.

२१ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, २२ गेर्षोन
वंशजांचीहि गणती त्यांचीं घराणीं व त्यांचीं पितृकुळें
यांस अनुसरून करावी; २३ म्हणजे तीस वर्षांपासून
पन्नास वर्षांपर्यंतचे जे पुरुष दर्शनमंडपाच्या सेवेंत
दाखल होतात त्यांची गणती करावी. २४ सेवा करणें
व ओझीं वाहणें यांसंबंधानें गेर्षोन्यांचें काम येणेंप्रमाणें:
२५ निवासमंडपाचे पडदे, दर्शनमंडप व त्याचें
आच्छादन, त्यावर असलेलें तहशाच्या कातड्याचें
आच्छादन, दर्शनमंडपाच्या दाराचा पडदा, २६ निवास-
मंडप आणि वेदी यांच्यासभोवतीं असलेल्या अंगणाचे
पडदे, अंगणाच्या दाराचे पडदे व दोऱ्या आणि
त्यांच्या सेवेस लागणारीं उपकरणें हें सर्व सामान
त्यांनीं उचलावें; आणि या वस्तूंसंबंधानें जें कांहीं काम
पडेल तें सर्व त्यांनीं करावें. २७ गेर्षोन वंशांतल्या
पुरुषांनीं आपली सर्व कामगिरी अहरोन व त्याचे पुत्र
यांच्या आज्ञेप्रमाणें करावी म्हणजे त्यांस जें कांहीं वाहून
न्यावयाचें व जी कांहीं सेवा करावयाची त्या सगळ्याचा
भार तुम्हीं त्यांजवरच सोपवावा. २८ दर्शनमंडपांत
गेर्षोन कुळांतल्या पुरुषांची सेवा ही; त्यांनीं अहरोन
याजकाचा पुत्र इथामार याच्या हाताखालीं असावें.

२९ मरारीपुत्रांचीहि, त्यांचीं घराणीं व त्यांचीं
पितृकुळें यांस अनुसरून, गणती करावी; ३० म्हणजे
तीस वर्षांच्या वयापासून पन्नास वर्षांपर्यंतचे जे
पुरुष दर्शनमंडपाच्या सेवेंत दाखल होतात त्यांची
गणती करावी. ३१ दर्शनमंडपांतल्या ज्या वस्तु वाहून
नेण्याची कामगिरी त्यांस करावी लागेल ती ही:
निवासमंडपाच्या फळ्या, अडसर, खांब आणि खुरच्या,
३२ आणि सभोवार असलेल्या अंगणाचे खांब, त्यांच्या
खुरच्या, मेखा, दोऱ्या आणि त्यांच्या सेवेस लागणारीं
इतर सर्व उपकरणें त्यांनीं वाहून न्यावीं व त्यांची
निगा राखावी; ही जी सगळी सामग्री त्यांना वाहून
न्यावयाची तींतील दरएक वस्तु नांव घेऊन त्यांच्या
स्वाधीन करावी. ३३ मरारीच्या कुळांतल्या पुरुषांस
जी सेवा दर्शनमंडपासंबंधानें करावी लागेल ती हीच;
त्यांनीं अहरोन याजकाचा पुत्र इथामार याच्या
हाताखालीं असावें.

३४ या प्रकारें मोशे आणि अहरोन आणि मंडळीचे
सरदार ह्यांनीं कहाथपुत्रांची, त्यांचीं घराणीं व त्यांचीं
पितृकुळें यांस अनुसरून, ३५ म्हणजे तीस वर्षांच्या
वयापासून पन्नास वर्षांपर्यंतचे जे पुरुष दर्शन-
मंडपाच्या सेवेस दाखल झाले त्यांची गणती केली.
३६ ज्या पुरुषांची त्यांच्या कुळांप्रमाणें मोजदाद केली

ते दोन हजार सातशें पन्नास होते. ३७ कहाथ कुळांपैकीं
जे पुरुष दर्शनमंडपांत सेवा करीत त्यांची गणती केली
ती इतकी भरली; परमेश्वरानें मोशाच्याद्वारें आज्ञा
दिली होती तीप्रमाणें मोशे आणि अहरोन यांनीं
त्यांची मोजदाद केली.

३८ गेर्षोनी वंशांतल्या पुरुषांची गणती त्यांचीं
घराणीं आणि पितृकुळें यांस अनुसरून करण्यांत
आली, ३९ म्हणजे तीस वर्षांच्या वयापासून पन्नास
वर्षांपर्यंतचे जे पुरुष दर्शनमंडपांत सेवा करीत त्यांची
गणती केली; ४० ज्या पुरुषांची त्यांच्या घराण्यांप्रमाणें,
त्यांच्या पितृकुळांप्रमाणें मोजदाद केली ते दोन
हजार सहाशें तीस होते. ४१ गेर्षोनकुळांतले जे
पुरुष दर्शनमंडपांत सेवा करीत त्यांची मोजदाद
केली ती इतकी भरली; परमेश्वरानें मोशाच्याद्वारें
आज्ञा दिली होती तीप्रमाणें मोशे आणि अहरोन
यांनीं त्यांची मोजदाद केली.

४२ मरारी वंशांतल्या ज्या पुरुषांची गणती त्यांचीं
घराणीं व पितृकुळें यांस अनुसरून करण्यांत आली,
४३ म्हणजे तीस वर्षांच्या वयापासून पन्नास वर्षांपर्यंतचे
जे पुरुष दर्शनमंडपांत सेवा करण्यास जात त्यांची
मोजदाद केली; ४४ त्यांच्या कुळांप्रमाणें त्यांची संख्या
तीन हजार दोनशें होती. ४५ मरारीच्या कुळांपैकीं ज्या
पुरुषांची गणती मोशे व अहरोन यांनीं परमेश्वरानें
मोशाच्याद्वारें दिलेल्या आज्ञेप्रमाणें केली, ते इतके भरले.

४६ मोशे, अहरोन आणि इस्राएलाचे सरदार
यांनीं लेव्यांची गणती त्यांचीं घराणीं व पितृ-
कुळें यांस अनुसरून केली, ४७ म्हणजे तीस
वर्षांच्या वयापासून पन्नास वर्षांच्या वयापर्यंतचे
पुरुष दर्शनमंडपाच्या सेवेंत दाखल होऊन ओझें
वाहण्याचें काम करीत, ४८ त्या सर्वांची संख्या आठ
हजार पांचशें ऐंशीं भरली. ४९ त्यांची सेवा आणि
कामाचा भार यांस अनुसरून परमेश्वराच्या सांगण्या-
वरून मोशाच्या द्वारें त्यांची गणती करण्यांत आली;
परमेश्वरानें मोशाला आज्ञा दिली होती तीप्रमाणें
त्यांची गणती करण्यांत आली.

१ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्राएल
५ लोकांस अशी आज्ञा कर: प्रत्येक महारोगी, प्रत्येक
स्रावी आणि मयतामुळें अशुचि झालेला प्रत्येक
जण यांस तुम्हीं छावणीबाहेर घालवून द्यावें; ३ मग
तो पुरुष असो अगर स्त्री असो; त्या सर्वांस
छावणीच्या बाहेर काढून लावावें; त्यांच्यामुळें तुमची
छावणी अशुद्ध होतां कामा नये, कारण तेथें माझा
निवास आहे. ४ इस्राएल लोकांनीं त्याप्रमाणें केलें;
त्यांनीं असल्या लोकांस छावणीच्याबाहेर लावून
दिलें; परमेश्वरानें मोशाला सांगितलें त्याप्रमाणें
इस्राएल लोकांनीं केलें.

५ परमेश्वर मोशाला म्हणाला, ६ इस्राएल लोकांस
असें सांग: कोणा पुरुषानें अथवा स्त्रीनें मानवाच्या
हातून घडणारें एकादें पाप करून परमेश्वराशीं बेइमानी
केली व तो अथवा ती दोषी ठरली, ७ तर
त्यांनीं स्वतः केलेलें पाप पदरीं घ्यावें; ज्याचा
त्यांनीं अपराध केला असेल त्यास आपल्या अपराधा-
बद्दल पुरा खंड देऊन त्यांत आणखी त्याचा पांचवा
हिस्सा भर घालावी; ८ पण अपराधाचा बदला
घ्यावयास त्या मनुष्याचा कोणी वारस नसला तर त्या
अपराधाबद्दल परमेश्वराला द्यावयाचा खंड याजकाचा
व्हावा; जो प्रायश्चित्ताचा मेंढा त्याच्या प्रायश्चित्ताप्रीत्यर्थ
अर्पिण्यांत येईल त्याशिवाय आणखी हा खंड वेगळा.
९ इस्राएल लोक ज्या पवित्र वस्तु समर्पित केलेला अंश
म्हणून याजकापाशीं आणितात त्या त्याच्याच होत.
१० प्रत्येक मनुष्यानें पवित्र केलेल्या वस्तु याजका-
च्याच होत; याजकास जें कांहीं कोणी देईल
तें सर्व याजकाचेंच होय.

११ परमेश्वर मोशाला म्हणाला, १२ इस्राएल
लोकांस सांग: जर कोणा पुरुषाच्या स्त्रीचें पाऊल
वांकडें पडून तिनें त्याजशीं बेइमानी केली, १३ आणि
कोणा पुरुषानें तिजशीं कुकर्म केलें, आणि ही गोष्ट
तिच्या पतीपासून छपली जाऊन प्रगट झाली नाहीं,
आणि ती भ्रष्ट झाली तरी तिच्याविरुद्ध कोणी साक्षी
नसला अथवा कुकर्म करितांना तिला पकडिलें नाहीं,

१४ आणि तिच्या पतीच्या मनांत परप्रेमशंका
उद्भवली आणि आपल्या स्त्रीच्या पातिव्रत्याविषयीं
त्यास संशय आला असून ती जर खरोखर भ्रष्ट झाली
असली अथवा तिच्या पतीच्या मनांत परप्रेमशंका
उद्भवून आपल्या स्त्रीच्या पातिव्रत्याबद्दल त्याला संशय
आला आणि ती वास्तविक भ्रष्ट झाली नसली, १५ तर
त्या पुरुषानें आपली स्त्री याजकाकडे न्यावी आणि
तिच्याप्रीत्यर्थ एक दशमांश एफा जव अर्पावे,
त्यानें त्यांवर तेल घालूं नये आणि धूप ठेवूं नये;
कारण परप्रेमशंकेमुळें केलेलें म्हणजे अधर्माचें स्मरण
देणारें हें अन्नार्पण होय. १६ मग याजकानें त्या स्त्रीस
पुढें नेऊन परमेश्वरापुढें उभें करावें; १७ आणि
याजकानें मातीच्या पात्रांत पवित्र जल घ्यावें आणि
निवासमंडपाच्या भूमीवरली थोडी धूळ घेऊन त्यांत
टाकावी; १८ मग याजकानें त्या स्त्रीस परमेश्वरापुढें
उभें करून तिच्या डोक्याचे केस सोडावे आणि परप्रेम-
शंकेचें स्मरण देणारें अन्नार्पण तिच्या हातावर ठेवावें
आणि शापजनक कटु जल याजकानें आपल्या हातीं
घ्यावें; १९ मग याजकानें त्या स्त्रीला शपथ घालून
म्हणावें, कोणा पुरुषानें तुजशीं कुकर्म केलें नसलें
आणि तूं आपल्या पतीस सोडून दुसऱ्याकडे जाऊन
भ्रष्ट झाली नसलीस तर तूं ह्या शापजनक कटु
जलाच्या परिणामापासून मुक्त राहा; २० पण तूं
आपल्या पतीस सोडून दुसऱ्याकडे राहून भ्रष्ट झाली
असलीस आणि तुझ्या पतीशिवाय परपुरुषानें तुजशीं
संबंध केला असला तर—२१ मग याजकानें शापजनक
शपथ तिला घ्यावयास लावावी आणि म्हणावें, परमेश्वर
तुझी मांडी सडवून व तुझें पोट फुगवून तुला लोकांच्या
शापास व तिरस्कारास पात्र करो; २२ म्हणजे
हें शापजनक जल तुझ्या आंतड्यांत शिरून त्यानें
तुझें पोट फुगेल व तुझी मांडी सडेल; यावर त्या
स्त्रीनें आमेन, आमेन, असें म्हणावें. २३ मग
याजकानें हे शापशब्द पुस्तकांत लिहून त्या कटु
जलांत धुऊन घ्यावे; २४ आणि तें शापजनक कटु
जल त्या स्त्रीस पाजावें; तें त्या स्त्रीच्या पोटांत जाऊन
कटुत्व उत्पन्न करील; २५ आणि याजकानें तें परप्रेम-
शंकेचें अन्नार्पण स्त्रीच्या हातून घेऊन परमेश्वरापुढें
ओवाळावें आणि वेदीपाशीं घेऊन जावें; २६ मग
याजकानें त्या अन्नार्पणापैकीं स्मारक म्हणून मूठभर
घेऊन त्याचा वेदीवर होम करावा आणि त्यानंतर स्त्रीला
तें पाणी पाजावें. २७ त्यानें तें पाणी तिला पाजिलें म्हणजे
असें होईल कीं जर ती भ्रष्ट झाली असली आणि तिनें
आपल्या नवऱ्याशीं बेइमानी केली असली तर हें शाप-
जनक जल तिच्या ठायीं शिरून कटुत्व उत्पन्न करील,
तिचें पोट फुगेल, तिची मांडी सडेल व तिच्या
लोकांत तिचें नांव शापदर्शक होईल; २८ पण
ती स्त्री भ्रष्ट झाली नसून शुद्ध असली तर ती मुक्त
होईल व गर्भधारणास पात्र होईल. २९ स्त्री आपल्या
पतीस सोडून परपुरुषाशीं जाऊन अशुद्ध होईल तेव्हां
परप्रेमशंकेचा हाच नियम होय; ३० कोणा पुरुषास
परप्रेमशंका उत्पन्न होऊन आपल्या स्त्रीविषयीं त्याचें
मन शंकित झालें तर त्यानें त्या स्त्रीस परमेश्वरासमोर
न्यावें आणि वरील नियमाप्रमाणें याजकानें तिच्या-
संबंधानें सर्व कांहीं करावें. ३१ मग तो पुरुष
अधर्मापासून मुक्त होईल आणि त्या स्त्रीच्या दुष्कर्माचें
फळ तिला मिळेल.

६ १ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्राएल
लोकांस सांग : कोणी पुरुष अथवा स्त्री नाजीराचा
म्हणजे आपणास परमेश्वराप्रीत्यर्थ वाहून घेण्याचा
विशेष नवस करील, ३ तर त्यानें द्राक्षारस व मद्य हीं
वर्ज्य करावीं, द्राक्षारसाचा किंवा मद्याचा शिरकाहि
पिऊं नये, द्राक्षांचा कसलाहि रस पिऊं नये, एवढेंच
नव्हे तर ताजीं किंवा सुकविलेलीं द्राक्षेंसुद्धां खाऊं
नयेत. ४ जितके दिवस तो आपणास वाहून घेईल
तितके दिवस त्यानें बियापासून सालपटापर्यंत द्राक्षवेलाचें
कांहींएक खाऊं नये. ५ जितके दिवस त्यानें वाहून
घेण्याचा नवस केला असेल, तितके दिवस त्यानें आपल्या
डोक्यावर वस्तरा फिरवूं नये; परमेश्वराप्रीत्यर्थ आपणास
वाहून घेण्याचा सगळा काळ त्यानें पवित्र असावें
आणि आपले केस वाढूं द्यावे. ६ जितके दिवस तो

परमेश्वराप्रीत्यर्थ आपणास वाहून घेईल तितके दिवस
त्यानें कोणत्याहि प्रेताजवळ जाऊं नये. ७ त्याचा बाप,
आई, भाऊ, बहीण यांपैकीं कोणी मेलें तरी त्यानें
सुतक धरूं नये, कारण देवासाठीं वाहून घेतल्याचें चिन्ह
त्याच्या डोक्यावर असतें. ८ आपले वाहून घेण्याचे सर्व
दिवस त्यानें परमेश्वराप्रीत्यर्थ पवित्र राहावें. ९ जर
कोणी अकस्मात् त्याच्याजवळ मरण पावला आणि
त्यामुळें वाहून घेतल्याचें चिन्ह असलेलें त्याचें डोकें
विटाळलें तर त्यानें शुद्ध होण्याच्या दिवशीं म्हणजे
सातव्या दिवशीं आपलें डोकें मुंडावें. १० आठव्या
दिवशीं त्यानें दोन होले किंवा पारव्याचीं दोन पिलें
दर्शनमंडपाच्या दाराशीं याजकाकडे घेऊन जावीं;
११ याजकानें एकाचा पापबलि व दुसऱ्याचा होमबलि
अर्पून त्याच्यासाठीं प्रायश्चित्त करावें; कारण त्या प्रेतामुळें
त्याला दोष लागला म्हणून याजकानें त्याच दिवशीं त्याचें
डोकें पुनः पवित्र करावें. १२ मग त्यानें परमेश्वराला
वाहून घेण्याच्या दिवसांचा नवस पुनरपि आचरावा;
त्यानें एक वर्षाचा मेंढा दोषार्पणासाठीं आणावा; त्याचे
पूर्वींचे दिवस हिशोबांत धरूं नयेत, कारण त्याचा
वाहून घेण्याचा नवस भ्रष्ट झाला.

१३ नाजीराचे वाहून घेण्याचे दिवस पुरे झाले
म्हणजे हा नियम पाळावा: त्यास दर्शनमंडपाच्या दाराशीं
आणावें; १४ आणि त्यानें परमेश्वराप्रीत्यर्थ अर्पण करावें;
त्यानें एक वर्षाचा निर्दोष मेंढा होमबलि म्हणून अर्पावा,
एक वर्षाची निर्दोष मेंढी पापार्पण म्हणून अर्पावी आणि
शांत्यर्पणासाठीं एक निर्दोष मेंढा अर्पावा; १५ आणि
एक टोपलीभर बेखमीर भाकरी म्हणजे तेलांत मळ-
लेल्या सपिठाच्या पोळ्या आणि तेल चोपडलेल्या बेखमीर
पापड्या आणि त्यांसोबतचीं अन्नार्पणें आणि पेयार्पणें
अर्पिण्यास आणावीं. १६ हें सर्व याजकानें परमेश्वरा-
समोर सादर करून त्याचे पापबलि आणि होमबलि
अर्पावे; १७ आणि टोपलीभर बेखमीर भाकरींसहित
मेंढ्याचें परमेश्वराप्रीत्यर्थ शांत्यर्पण करावें, आणि त्या-
बरोबरचें अन्नार्पण आणि पेयार्पण हीं याजकानें अर्पावीं.
१८ मग नाजीरानें वाहून घेतल्याचें चिन्ह असलेलें
आपलें डोकें दर्शनमंडपाच्या दाराशीं मुंडावें आणि
आपले केस शांत्यर्पणाच्या खालीं असलेल्या अग्नीवर
टाकावे. १९ नाजीरानें आपलें वाहून घेण्याचें चिन्ह
असलेलें आपलें डोकें मुंडिल्यावर याजकानें मेंढ्याचा
शिजविलेला फरा व टोपलींतील एक बेखमीर भाकर
व एक बेखमीर पापडी हीं घेऊन नाजीराच्या हातांवर
ठेवावीं; २० याजकानें तीं ओवाळणी म्हणून परमेश्वरा-
समोर ओवाळावीं; ओवाळलेले ऊर आणि फरा हे
याजकासाठीं पवित्र समजावे; यानंतर नाजीरास
द्राक्षारस पिण्याची मोकळीक आहे. २१ नाजीराचा
नवस, आणि आपणास परमेश्वराप्रीत्यर्थ अर्पण अर्पा-
वयाचें त्यांविषयींचा नियम हा; याखेरीज त्यानें
शक्त्यनुसार वाटेल तें द्यावें; केलेल्या नवसाप्रमाणें
त्यानें वाहून घेण्याच्या नियमास अनुसरून वागावें.

२२ परमेश्वर मोशाला म्हणाला, २३ अहरोन व
त्याचे पुत्र यांस असें सांग: तुम्ही इस्राएल लोकांस
आशीर्वाद देतांना येणेंप्रमाणें म्हणा:—

२४ परमेश्वर तुला आशीर्वाद देवो व तुझें
संरक्षण करो;

२५ परमेश्वर आपला मुखप्रकाश तुजवर पाडो व
तुजवर कृपा करो;

२६ परमेश्वर तुजकडे प्रसन्नमुख करो आणि तुला
शांति देवो.

२७ या रीतीनें त्यांनीं इस्राएल लोकांवर माझें नाम
मुद्रित करावें म्हणजे मी त्यांस आशीर्वाद देईन.

७ १ मग मोशानें निवासमंडप उभा करण्याचें
संपविलें आणि तो व त्यांतील सर्व सामान हीं
तैलाभ्यंग करून पवित्र केलीं आणि वेदी व तिचीं
सर्व पात्रें हींहि तैलाभ्यंग करून पवित्र केलीं.
२ तेव्हां असें झालें कीं इस्राएलाचे सरदार जे
आपआपल्या पितृकुलाचे मुख्य पुरुष होते त्यांनीं
अर्पणें आणिलीं; हे निरनिराळ्या वंशांचे सरदार असून
त्यांची खानेसुमारी केलेल्या लोकांवर देखरेख होती;
३ त्यांनीं परमेश्वराला अर्पण आणिलें तें हें: वरून
झाकलेल्या सहा गाड्या आणि बारा बैल म्हणजे दोन

दोन सरदारांमागें एक एक गाडी आणि एक एक सरदारामागें एक एक बैल; त्यांनीं तीं निवासमंडपासमोर नेऊन सादर केलीं. ४ मग परमेश्वर मोशाला म्हणाला, ५ तीं स्वीकार म्हणजे दर्शनमंडपाच्या सेवेकडे त्यांचा उपयोग होईल आणि तीं लेव्यांला प्रत्येकाच्या सेवेप्रमाणें वांटून दे. ६ तेव्हां मोशानें त्या गाड्या व बैल घेऊन लेव्यांस दिले. ७ गेर्षोनवंशजांस त्यांच्या सेवेप्रमाणें दोन गाड्या आणि चार बैल दिले. ८ मरारीवंशजांस त्यांच्या सेवेप्रमाणें चार गाड्या व आठ बैल दिले; हे सर्व अहरोन याजकाचा पुत्र इथामार याच्या हाताखालीं होते; ९ पण कहाथवंशजांस कांहीं दिलें नाहीं, कारण पवित्रस्थानांतील वस्तु आपल्या खांद्यावर वाहण्याची सेवा त्यांस नेमून दिली होती. १० वेदीचा तैलाभ्यंग झाला त्या दिवशीं सरदारांनीं तिच्या संस्काराचीं अर्पणें आणून वेदीपुढें सादर केलीं. ११ तेव्हां परमेश्वरानें मोशाला सांगितलें कीं वेदीच्या संस्कारासाठीं सरदारांनीं आपआपलें अर्पण आपआपल्या नेमिलेल्या दिवशीं घेऊन यावें.

१२ पहिल्या दिवशीं ज्यानें अर्पण आणिलें तो यहूदा वंशांतील आम्मीनादाबाचा पुत्र नहशोन होता. १३ त्याचें अर्पण हें होतें: पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एकशें तीस शेकेल चांदीचें एक ताट आणि सत्तर शेकेल चांदीचा एक कटोरा, हीं दोन्हीं अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेल्या सपिठानें भरलीं होतीं; १४ धुपानें भरलेलें दहा शेकेल सोन्याचें एक धुपाटणें, १५ होमार्पणासाठीं एक गोऱ्हा, एक मेंढा व एक वर्षाचें कोकरूं, १६ पापार्पणासाठीं एक बकरा, १७ शांत्यर्पणांसाठीं दोन बैल, पांच मेंढे, पांच बकरे आणि एक वर्षाचीं पांच कोकरें, हें सर्व अर्पण आम्मीनादाबाचा पुत्र नहशोन यानें आणिलें.

१८ दुसऱ्या दिवशीं इस्साखार वंशांतील सरदार सूवाराचा पुत्र नथनेल यानें अर्पण आणलें; १९ तें हें: पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एकशें तीस शेकेल चांदीचें एक ताट आणि सत्तर शेकेल चांदीचा एक कटोरा, हीं दोन्ही अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेल्या सपिठानें भरलीं होतीं; २० धुपानें भरलेलें दहा शेकेल सोन्याचें एक धुपाटणें, २१ होमार्पणासाठीं एक गोऱ्हा, एक मेंढा व एक वर्षाचें कोकरूं, २२ पापार्पणासाठीं एक बकरा, २३ शांत्यर्पणांसाठीं दोन बैल, पांच मेंढे, पांच बकरे आणि एक वर्षाचीं पांच कोकरें; हें सर्व अर्पण सूवाराचा पुत्र नथनेल यानें आणिलें.

२४ तिसऱ्या दिवशीं जबुलून वंशाचा अधिकारी हेलोनाचा पुत्र अलीयाब यानें अर्पण आणिलें; २५ तें हें: पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एकशें तीस शेकेल चांदीचें एक ताट आणि सत्तर शेकेल चांदीचा एक कटोरा, हीं दोन्ही अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेल्या सपिठानें भरलीं होतीं; २६ धुपानें भरलेलें दहा शेकेल सोन्याचें एक धुपाटणें, २७ होमार्पणासाठीं एक गोऱ्हा, एक मेंढा व एक वर्षाचें कोकरूं; २८ पापार्पणासाठीं एक बकरा, २९ शांत्यर्पणांसाठीं दोन बैल, पांच मेंढे, पांच बकरे आणि एक वर्षाचीं पांच कोकरें; हें सर्व अर्पण हेलोनाचा पुत्र अलीयाब यानें आणिलें.

३० चौथ्या दिवशीं रऊबेनाच्या वंशाचा सरदार शदेयुराचा पुत्र अलीसूर यानें अर्पण आणिलें; ३१ तें हें: पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एकशें तीस शेकेल चांदीचें एक ताट आणि सत्तर शेकेल चांदीचा एक कटोरा, हीं दोन्ही अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेल्या सपिठानें भरलीं होतीं; ३२ धुपानें भरलेलें दहा शेकेल सोन्याचें एक धुपाटणें, ३३ होमार्पणासाठीं एक गोऱ्हा, एक मेंढा व एक वर्षाचें कोकरूं, ३४ पापार्पणासाठीं एक बकरा, ३५ शांत्यर्पणांसाठीं दोन बैल, पांच मेंढे, पांच बकरे आणि एक वर्षाचीं पांच कोकरें; हें सर्व अर्पण शदेयुराचा पुत्र अलीसूर यानें आणिलें.

३६ पांचव्या दिवशीं शिमोन वंशाचा सरदार सुरीशाद्दैचा पुत्र शलुमीयेल यानें अर्पण आणिलें; ३७ तें हें: पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एकशें तीस शेकेल चांदीचें एक ताट आणि सत्तर शेकेल चांदीचा एक कटोरा, हीं दोन्ही अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेल्या सपिठानें भरलीं होतीं; ३८ धुपानें भरलेलें दहा शेकेल सोन्याचें एक धुपाटणें, ३९ होमार्पणासाठीं

एक गोऱ्हा, एक मेंढा व एक वर्षाचें कोकरूं, ४० पापार्पणासाठीं एक बकरा, ४१ शांत्यर्पणांसाठीं दोन बैल, पांच मेंढे, पांच बकरे आणि एक वर्षाचीं पांच कोकरें; हें सर्व अर्पण सुरीशाद्दैचा पुत्र शलुमीयेल यानें आणिलें.

४२ सहाव्या दिवशीं गाद वंशाचा सरदार दगुवेलाचा पुत्र एल्यासाप यानें अर्पण आणिलें; ४३ तें हें: पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एकशें तीस शेकेल चांदीचें एक ताट आणि सत्तर शेकेल चांदीचा एक कटोरा, हीं दोन्ही अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेल्या सपिठानें भरलीं होतीं; ४४ धुपानें भरलेलें दहा शेकेल सोन्याचें एक धुपाटणें, ४५ होमार्पणासाठीं एक गोऱ्हा, एक मेंढा व एक वर्षाचें कोकरूं, ४६ पापार्पणासाठीं एक बकरा, ४७ शांत्यर्पणांसाठीं दोन बैल, पांच मेंढे, पांच बकरे, आणि एक वर्षाचीं पांच कोकरें; हें सर्व अर्पण दगुवेलाचा पुत्र एल्यासाप यानें आणिलें.

४८ सातव्या दिवशीं एफ्राईम वंशाचा सरदार आम्मीहूदाचा पुत्र अलीशामा यानें अर्पण आणिलें; ४९ तें हें: पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एकशें तीस शेकेल चांदीचें एक ताट आणि सत्तर शेकेल चांदीचा एक कटोरा, हीं दोन्ही अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेल्या सपिठानें भरलीं होतीं; ५० धुपानें भरलेलें दहा शेकेल सोन्याचें एक धुपाटणें, ५१ होमार्पणासाठीं एक गोऱ्हा, एक मेंढा व एक वर्षाचें कोकरूं, ५२ पापार्पणासाठीं एक बकरा, ५३ शांत्यर्पणांसाठीं दोन बैल, पांच मेंढे पांच बकरे आणि एक वर्षाचीं पांच कोकरें; हें सर्व अर्पण आम्मीहूदाचा पुत्र अलीशामा यानें आणिलें.

५४ आठव्या दिवशीं मनश्शेवंशाचा सरदार पदाहसुराचा पुत्र गमलीयेल यानें अर्पण आणिलें; ५५ तें हें: पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एकशें तीस शेकेल चांदीचें एक ताट आणि सत्तर शेकेल चांदीचा एक कटोरा, हीं दोन्ही अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेल्या सपिठानें भरलीं होतीं; ५६ धुपानें भरलेलें दहा शेकेल सोन्याचें एक धुपाटणें, ५७ होमार्पणासाठीं एक गोऱ्हा, एक मेंढा व एक वर्षाचें कोकरूं, ५८ पापार्पणासाठीं एक बकरा, ५९ शांत्यर्पणांसाठीं दोन बैल, पांच मेंढे, पांच बकरे, आणि एक वर्षाचीं पांच कोकरें; हें सर्व अर्पण पदाहसुराचा पुत्र गमलीयेल यानें आणिलें.

६० नवव्या दिवशीं बन्यामीन वंशाचा सरदार गिदोनीचा पुत्र अबीदान यानें अर्पण आणिलें; ६१ तें हें: पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एकशें तीस शेकेल चांदीचें एक ताट आणि सत्तर शेकेल चांदीचा एक कटोरा; हीं दोन्ही अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेल्या सपिठानें भरलीं होतीं; ६२ धुपानें भरलेलें दहा शेकेल सोन्याचें एक धुपाटणें, ६३ होमार्पणासाठीं एक गोऱ्हा, एक मेंढा व एक वर्षाचें कोकरूं, ६४ पापार्पणासाठीं एक बकरा, ६५ शांत्यर्पणांसाठीं दोन बैल, पांच मेंढे, पांच बकरे आणि एक वर्षाचीं पांच कोकरें; हें सर्व अर्पण गिदोनीचा पुत्र अबीदान यानें आणिलें.

६६ दहाव्या दिवशीं दानवंशाचा सरदार आम्मीशाद्दैचा पुत्र अहीएजर यानें अर्पण आणिलें; ६७ तें हें: पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एकशें तीस शेकेल चांदीचें एक ताट आणि सत्तर शेकेल चांदीचा एक कटोरा, हीं दोन्ही अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेल्या सपिठानें भरलीं होतीं; ६८ धुपानें भरलेलें दहा शेकेल सोन्याचें एक धुपाटणें, ६९ होमार्पणासाठीं एक गोऱ्हा, एक मेंढा व एक वर्षाचें कोकरूं, ७० पापार्पणासाठीं एक बकरा, ७१ शांत्यर्पणांसाठीं दोन बैल, पांच मेंढे, पांच बकरे आणि एक वर्षाचीं पांच कोकरें; हें सर्व अर्पण आम्मीशाद्दैचा पुत्र अहीएजर यानें आणिलें.

७२ अकराव्या दिवशीं आशेर वंशाचा सरदार आक्रानाचा पुत्र पगीयेल यानें अर्पण आणिलें; ७३ तें हें: पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एकशें तीस शेकेल चांदीचें एक ताट आणि सत्तर शेकेल चांदीचा एक कटोरा, हीं दोन्ही अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेल्या सपिठानें भरलेलीं होतीं; ७४ धुपानें भरलेलें दहा शेकेल सोन्याचें एक धुपाटणें, ७५ होमार्पणासाठीं एक गोऱ्हा, एक मेंढा व एक वर्षाचें कोकरूं, ७६ पापार्पणासाठीं एक बकरा, ७७ शांत्यर्पणांसाठीं दोन बैल, पांच मेंढे, पांच बकरे आणि एक वर्षाचीं पांच कोकरें; हें सर्व अर्पण आक्रानाचा पुत्र पगीयेल यानें आणिलें.

७८ बाराव्या दिवशीं नफताली वंशाचा सरदार
एनानाचा पुत्र अहीरा यानें अर्पण आणिलें; ७९ तें
हें: पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें एकशें तीस शेकेल
चांदीचें एक ताट आणि सत्तर शेकेल चांदीचा एक
कटोरा, हीं दोन्ही अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेल्या
सपिठानें भरलीं होतीं; ८० धुपानें भरलेलें दहा
शेकेल सोन्याचें एक धुपाटणें, ८१ होमार्पणासाठीं एक
गोऱ्हा, एक मेंढा व एक वर्षाचें कोकरूं, ८२ पापार्पणा-
साठीं एक बकरा, ८३ शांत्यर्पणांसाठीं दोन बैल, पांच
मेंढे, पांच बकरे आणि एक वर्षाचीं पांच कोकरें; हें
सर्व अर्पण एनानाचा पुत्र अहीरा यानें आणिलें.
८४ वेदीस तैलाभ्यंग झाला तेव्हां इस्राएल
लोकांच्या सरदारांकडून तिच्या संस्काराचें अर्पण हें
होतें; म्हणजे चांदीचीं बारा ताटें, चांदीचे बारा कटोरे
व सोन्याचीं बारा धुपाटणीं; ८५ एकेक चांदीचें ताट
एकशें तीस शेकेलांचें व एकेक चांदीचा कटोरा
सत्तर शेकेलांचा अशीं एकंदर सर्व चांदीचीं पात्रें
पवित्रस्थानांतील चलनाप्रमाणें दोन हजार चारशें
शेकेलांचीं होतीं; ८६ धुपानें भरलेलीं सोन्याचीं
बारा धुपाटणीं पवित्रस्थानाच्या चलनाप्रमाणें दहा
दहा शेकेलांचीं होतीं; एकंदर सर्व धुपाटणीं एकशें
वीस शेकेलांचीं होतीं. ८७ याशिवाय होमार्पणासाठीं
सर्व मिळून बारा गोऱ्हे, बारा मेंढे, वर्षावर्षाचीं बारा
कोकरें हीं सर्व त्यांबरोबरच्या अन्नार्पणासह होतीं;
तसेंच पापार्पणासाठीं बारा बकरे होते; ८८ आणि
शांत्यर्पणांसाठीं सर्व मिळून चोवीस बैल, साठ मेंढे,
साठ बकरे आणि वर्षावर्षाचीं साठ कोकरें होतीं.
वेदीचा तैलाभ्यंग झाल्यावर तिला संस्कार करण्यासाठीं
हीं अर्पणें होतीं. ८९ मोशे परमेश्वराशीं बोलण्यास
दर्शनमंडपांत गेला तेव्हां आज्ञापटाच्या कोशावर
असलेल्या दोन्ही करूबांमधल्या दयासनावरून त्यानें
वाणी होतांना ऐकली; तो त्याजशीं बोलला.

१ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ अहरोनाला
८ सांग कीं तूं दिवे लावशील तेव्हां दीपवृक्षासमोर
सातहि दिव्यांचा प्रकाश पडावा. ३ अहरोनानें
तसें केलें; परमेश्वरानें मोशाला आज्ञा दिली होती
त्याप्रमाणें दीपवृक्षासमोर प्रकाश पडावा म्हणून त्यानें
दिवे उजळले. ४ दीपवृक्षाचें सर्व काम घडींव सोन्याचें
होतें; तळापासून नकशीच्या फुलांपर्यंत घडींव काम
होतें; परमेश्वरानें मोशाला नमुना दाखविला होता
त्याप्रमाणें त्यानें तो दीपवृक्ष केला.

५ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, ६ इस्राएल
लोकांमधून लेव्यांस वेगळे करून शुद्ध कर. ७ तूं
त्यांच्या शुद्धीकरणासाठीं येणेंप्रमाणें कर: पापक्षालनाच्या
जलाचें त्यांजवर सिंचन कर, व त्यांनीं आपल्या
सगळ्या अंगावर वस्तरा फिरवावा, वस्त्रें धुवावीं
आणि शुद्ध व्हावें. ८ मग त्यांनीं एक गोऱ्हा व
तेलांत मळलेल्या सपिठाचें अन्नार्पण घेऊन यावें आणि
पापार्पणासाठीं आणखी एक गोऱ्हा आणावा. ९ मग
तूं लेव्यांस दर्शनमंडपासमोर सादर करावें, आणि
इस्राएल लोकांची सर्व मंडळी तेथें जमवावी; १० मग
तूं लेव्यांस परमेश्वरासमोर सादर करावें आणि इस्राएल
लोकांनीं आपले हात त्यांजवर ठेवावे; ११ लेवी
परमेश्वराची सेवा करणारे व्हावे यासाठीं इस्राएल
लोकांच्या तर्फे अहरोनानें त्यांस ओवाळणी म्हणून
परमेश्वरासमोर सादर करावें. १२ लेव्यांनीं आपले
हात गोऱ्ह्यांच्या डोक्यांवर ठेवावे; आणि तूं लेव्यां-
प्रीत्यर्थ प्रायश्चित्त करण्यासाठीं एक गोऱ्हा पापार्पण व
दुसरा होमार्पण म्हणून परमेश्वराला अर्पावा. १३ मग
लेव्यांस अहरोन व त्याचे पुत्र यांच्यासमोर उभें करून
परमेश्वराला ओवाळणी म्हणून अर्पावें. १४ या प्रकारें
तूं लेव्यांस इतर इस्राएल लोकांपासून वेगळें करावें;
लेवी हे माझे होणार. १५ यानंतर लेव्यांनीं सेवा
करण्यास दर्शनमंडपांत जावें; तूं लेव्यांस शुद्ध केल्यावर
ओवाळणी म्हणून त्यांस अर्पावें. १६ कारण इस्राएल
लोकांतून ते मला सर्वस्वी वाहिलेले आहेत; इस्राएल
लोकांच्या पोटच्या सर्व प्रथम जन्मलेल्यांच्या ऐवजीं मीं
त्यांस आपले करून घेतले आहेत. १७ कारण इस्राएल
लोकांपैकीं अथवा त्यांच्या पशूंपैकीं सर्व प्रथम जन्मलेले
माझेच आहेत, मग ते पुरुष असोत कीं पशु असोत;

मिसर देशांतील सर्व प्रथम जन्मलेले मीं मारिले त्या
दिवशीं मीं त्यांस आपल्यासाठीं पवित्र केलें. १८ इस्राएल
लोकांतील सर्व प्रथम जन्मलेल्यांच्या ऐवजीं मीं लेव्यांस
घेतलें. १९ दर्शनमंडपांत इस्राएल लोकांसाठीं सेवा
करावी व प्रायश्चित्त करावें म्हणून मीं त्यांस इस्रा-
एलांतून घेऊन अहरोन व त्याचे पुत्र यांस दान म्हणून
दिलें आहे, यासाठीं कीं इस्राएल लोक पवित्र-
स्थानाच्या सन्निध आले असतां त्यांजवर अनर्थ गुदरूं
नये. २० मोशे, अहरोन आणि इस्राएल लोकांची सर्व
मंडळी यांनीं या प्रकारें लेव्यांचें केलें; परमेश्वरानें
लेव्यांविषयीं मोशाला आज्ञा केली होती तीप्रमाणें इस्राएल
लोकांनीं त्यांचें केलें. २१ लेवी आपल्या पापाचें
क्षालन करून पावन झाले; त्यांनीं आपलीं वस्त्रें धुतलीं
आणि अहरोनानें त्यांस परमेश्वरासमोर ओवाळणी
म्हणून अर्पिलें; आणि त्यांच्या पापक्षालनार्थ अहरोनानें
त्यांच्यासाठीं प्रायश्चित्त केलें. २२ त्यानंतर अहरोन व
त्याचे पुत्र यांजसमोर दर्शनमंडपांत आपआपली
नेमिलेली सेवा करण्यासाठीं लेवी गेले, आणि लेव्यां-
संबंधानें जी आज्ञा परमेश्वरानें मोशाला केली होती
तीप्रमाणें त्यांचें त्यांनीं केलें.

२३ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, २४ लेव्यां-
विषयींचा हा नियम: पंचविसाव्या वर्षाच्या वयापासून
त्यांनीं दर्शनमंडपासंबंधाची सेवा आचरावी; २५ ते
पन्नास वर्षांचे झाल्यावर त्यांनीं आपल्या या सेवाधर्मा-
पासून मुक्त व्हावें, यानंतर पुढें त्यांनीं ही सेवा करूं नये;
२६ पण त्यांनीं आपल्या भाऊबंदांसह दर्शनमंडपांत
रक्षकाचें काम करावें, दुसरी कांहीं सेवा करूं नये.
लेव्यांस सोपलेल्या कामासंबंधानें तूं त्यांचें असें करावें.

१ इस्राएल लोक मिसर देशांतून निघाल्यावर
९ दुसऱ्या वर्षाच्या पहिल्या महिन्यांत परमेश्वरानें
सीनाय रानांत मोशाला सांगितलें, २ इस्राएल
लोकांनीं वल्हांडण सण नेमिलेल्या काळीं पाळावा. ३ या
महिन्याच्या चतुर्दशीस संध्याकाळीं त्याच्यासंबंधाचे सर्व
विधि व नियम यांस अनुसरून तुम्हीं तो नेमिलेल्या
काळीं पाळावा. ४ मग मोशानें इस्राएल लोकांस वल्हांडण
सण पाळावयास सांगितलें. ५ त्याप्रमाणें त्यांनीं
पहिल्या महिन्याच्या चतुर्दशीस सायंकाळीं सीनाय
रानांत वल्हांडण सण पाळिला; परमेश्वरानें मोशाला
आज्ञा दिली होती त्याप्रमाणें इस्राएल लोकांनीं केलें.
६ एका मनुष्याच्या प्रेतामुळें अशुचि झालेले कांहीं
लोक होते, त्यांस त्या दिवशीं वल्हांडण सण पाळतां
येईना, म्हणून ते त्या दिवशीं मोशे व अहरोन
यांजपाशीं येऊन ७ मोशास म्हणाले, एका मनुष्याच्या
प्रेतामुळें आम्ही अशुचि झालों आहों; तर इस्राएल
लोकांबरोबर नेमिलेल्या काळीं परमेश्वराला अर्पण
आणण्याची आम्हांस कां मनाई असावी ? ८ मोशे
त्यांस म्हणाला, जरा थांबा, म्हणजे परमेश्वर तुमच्या
संबंधानें काय आज्ञा देईल ती मी ऐकतों.

९ परमेश्वर मोशाला म्हणाला, १० इस्राएल लोकांस
सांग: तुमच्यांतला किंवा तुमच्या वंशजांतला कोणी
प्रेतामुळें अशुचि झाला किंवा दूर प्रवासांत असला
तरी त्यानें परमेश्वराप्रीत्यर्थ वल्हांडण सण पाळावा.
११ दुसऱ्या महिन्याच्या चतुर्दशीस संध्याकाळीं त्यांनीं
सण पाळावा आणि वल्हांडणाचा यज्ञपशु बेखमीर
भाकर आणि कडू भाजी यांबरोबर खावा; १२ त्यानें
त्यांतलें सकाळपर्यंत कांहीं राखून ठेवूं नये व त्याचें
हाड मोडूं नये; वल्हांडणाच्या सर्व विधीप्रमाणें त्यांनीं
हा सण पाळावा. १३ एकादा मनुष्य शुचिर्भूत आहे
व प्रवासांत नाहीं, असें असूनहि त्यानें वल्हांडण सण
पाळण्याची हयगय केली तर त्या व्यक्तीचा स्वजनांतून
उच्छेद व्हावा; नेमिलेल्या काळीं त्यानें परमेश्वरास अर्पण
आणिलें नाहीं म्हणून त्याच्या दुष्कर्माचें फळ त्याला मिळेल.
१४ तुमच्यामध्यें राहणाऱ्या कोणा परदेशीयाला परमे-
श्वराप्रीत्यर्थ वल्हांडण सण पाळण्याची इच्छा असली तर
त्यानें या सणाचे विधि व नियम यांस अनुसरून तो
पाळावा. देशीय व परदेशीय या दोघांसहि एकच नियम.

१५ ज्या दिवशीं निवासमंडप म्हणजे आज्ञापटाचा
डेरा उभा केला, त्या दिवशीं मेघानें त्यावर छाया केली;
संध्याकाळीं तो निवासमंडपावर अग्नीसारखा भासला
आणि सकाळपर्यंत राहिला. १६ असें नित्य होत असे;

दिवसा मेघ त्यावर आच्छादन घाली, व रात्रीं तो अग्नी-
सारखा भासे. १७ जेव्हां जेव्हां त्या डेऱ्यावरून मेघ वर
चढे तेव्हां तेव्हां इस्राएल लोक कूच करीत आणि तो
मेघ जेथें थांबे तेथें आपला तळ देत. १८ परमेश्वराच्या
आज्ञेनें इस्राएल लोक कूच करीत व त्याच्याच आज्ञेनें
तळ देत; निवासमंडपावर जितके दिवस मेघ राही
तितके दिवस ते तळ देऊन राहत. १९ मेघ
निवासमंडपावर छाया करून बरेच दिवस तसाच
राहिला तरी इस्राएल लोक परमेश्वराचा निर्बंध पाळून
कूच करीत नसत. २० कधींकधीं मेघ थोडेच दिवस
निवासमंडपावर छाया करून असे तेव्हां परमेश्वराच्या
सांगण्याप्रमाणें ते तसेच तळ देऊन राहत आणि पुनः
त्याची आज्ञा झाली म्हणजे कूच करीत. २१ कधींकधीं
मेघ केवळ संध्याकाळपासून सकाळपर्यंत राहत असे
आणि सकाळीं तो हालला म्हणजे ते कूच करीत;
दिवसां किंवा रात्रीं मेघ वरतीं गेला कीं ते कूच करीत.
२२ तो मेघ निवासमंडपावर छाया करून दोन दिवस
राहिला, एक महिना राहिला किंवा एक वर्ष राहिला
तरी ते कूच करीत नसत; तो वर चढला म्हणजे ते
कूच करीत. २३ परमेश्वराच्या आज्ञेनें ते तळ देत व
त्याच्या आज्ञेनें ते तळ हालवीत; परमेश्वरानें मोशाच्या
द्वारें त्यांस आज्ञा केली तीप्रमाणें त्यांनीं परमेश्वराचा
निर्बंध पाळिला.

१० १ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, २ तूं
रुप्याचा पत्रा ठोकून दोन करणे बनीव; मंडळीस
बोलावण्याचें असलें आणि तळ उठवावयाचा
असला म्हणजे त्यांचा उपयोग करावा. ३ हे दोन्ही
करणे वाजविले म्हणजे सर्व मंडळी दर्शनमंडपाच्या
दाराशीं तुजपाशीं जमा व्हावी. ४ एकच करणा
वाजविला म्हणजे इस्राएलांच्या हजारांचे नायक म्हणजे
सरदार यांनीं तुजपाशीं जमा व्हावें. ५ करण्याचा
मोठा गजर केला म्हणजे पूर्व दिशेच्या गोटांनीं कूच
करावें. ६ असाच दुसऱ्यांदा मोठा गजर केला म्हणजे
दक्षिण बाजूस असलेल्या गोटांनीं कूच करावें; कूच
करावयाचें असलें म्हणजे करण्याचा एक मोठा गजर
करावा. ७ मंडळी एकत्र बोलावण्याची असल्यास
करणा वाजवावा, पण मोठा गजर करूं नये.
८ अहरोनाचे पुत्र जे याजक त्यांनीं हे करणे वाजवावे;
हा तुम्हांस पिढ्यानपिढ्या निरंतरचा विधि होय.
९ तुमच्या देशांत तुम्हांस त्रस्त करणाऱ्या शत्रूशीं
झुंजावयास निघाल तेव्हां तुम्ही करण्यांचा मोठा गजर
करा; म्हणजे तुमचा देव परमेश्वर यास तुमची आठवण
होऊन शत्रूंपासून तुमचा बचाव होईल. १० आपल्या
आनंदाच्या दिवशीं, नेमिलेल्या सणाच्या दिवशीं आणि
प्रत्येक महिन्याच्या आरंभीं आपले होमबलि व
शांत्यर्पणांचे बलि अर्पण करीत असतांना हे करणे
वाजवा; ते तुमच्या देवास तुमची आठवण देतील;
मी परमेश्वर तुमचा देव आहें.

११ दुसऱ्या वर्षी दुसऱ्या महिन्याच्या विसाव्या
दिवशीं आज्ञापटाच्या निवासमंडपावरील मेघ वर
चढला. १२ तेव्हां इस्राएल लोकांनीं सीनाय रानांतून
कूच केलें; नंतर मेघ पारानाच्या रानांत स्थिर झाला.
१३ परमेश्वरानें मोशाच्या द्वारें आज्ञा केली होती तिला
अनुसरून त्यांनीं पहिलें कूच केलें. १४ पहिल्यानें
यहूदा वंशाच्या लष्कराच्या टोळ्याटोळ्या होऊन त्यांचा
झेंडा निघाला; त्यांचा सेनानायक आम्मीनादाबाचा पुत्र
नहशोन हा होता. १५ इस्साखार वंशांतील लोकांचा
सेनानायक सुवाराचा पुत्र नथनेल हा होता. १६ जबु-
लून वंशांतील लोकांचा सेनानायक हेलोनाचा पुत्र
अलीयाब हा होता. १७ मग निवासमंडप उतरला
आणि गेर्षोनपुत्रांनीं व मरारीपुत्रांनीं निवासमंडप उच-
लून कूच केलें. १८ मग रऊबेन वंशाच्या लष्कराच्या
टोळ्याटोळ्या होऊन त्यांचा झेंडा निघाला; त्यांचा
सेनानायक शदेयुराचा पुत्र अलीसूर हा होता.
१९ शिमोन वंशांतील लोकांचा सेनानायक सुरी-
शाद्दैचा पुत्र शलूमीयेल हा होता. २० गाद वंशांतील
लोकांचा सेनानायक दगुवेलाचा पुत्र एल्यासाप हा
होता. २१ मग कहाथ्यांनीं पवित्रस्थानांतलें साहित्य
उचलून कूच केलें; ते जाऊन पोहंचत तोंपर्यंत
अगोदरच्यांनीं निवासमंडप उभारून ठेविला. २२ एफ्राईम

वंशाच्या लष्कराच्या टोळ्याटोळ्या होऊन त्यांचा झेंडा निघाला; त्यांचा सेनानायक आम्मीहूदाचा पुत्र अलीशामा हा होता. २३ मनश्शे वंशांतील लोकांचा सेनानायक पदाहसुराचा पुत्र गमलीयेल हा होता. २४ बन्यामीन वंशांतील लोकांचा सेनानायक गिदोनीचा पुत्र अबीदान हा होता. २५ मग सर्व गोटांच्या मागें असलेल्या दान वंशाच्या लष्कराच्या टोळ्याटोळ्या होऊन त्यांचा झेंडा निघाला; त्यांचा सेनानायक आम्मीशाद्दैचा पुत्र अहीएजर हा होता. २६ आशेर वंशांतील लोकांचा सेनानायक आक्रानाचा पुत्र पागीयेल हा होता. २७ नफताली वंशांतील लोकांचा सेनानायक एनानाचा पुत्र अहीरा हा होता. २८ या प्रकारें इस्राएल लोक आपआपल्या सेनांच्या अनुक्रमें प्रवासांत कूच करीत.

२९ मोशानें आपला सासरा मिद्यानी रगुवेल याचा पुत्र होबाब यास म्हटलें कीं परमेश्वरानें आम्हांला देतों म्हणून सांगितलेल्या प्रदेशाकडे आम्ही जात आहों, तर तूं आम्हांबरोबर चल म्हणजे आम्ही तुझें कल्याण करूं; कारण इस्राएलाचें कल्याण करीन असें परमेश्वर बोलला आहे. ३० होबाब त्यास म्हणाला, मी नाहीं यावयाचा; मी आपला देश व आपले आप्त यांजकडे जाईन. ३१ तेव्हां मोशे त्यास म्हणाला, आम्हांस सोडून जाऊं नको; कारण या जंगलांत कोठेंकोठें तळ द्यावयाचा ही तुला माहिती आहे; तूं आम्हांस नेत्रांच्या ठिकाणीं हो. ३२ तूं आम्हांबरोबर आल्यास परमेश्वर आमचें जें कांहीं बरें करील त्याप्रमाणें आम्ही तुझेंहि अवश्य बरें करूं.

३३ इस्राएल लोक परमेश्वराच्या पर्वतापासून मार्गस्थ होऊन तीन दिवसांची वाट चालून गेले; त्यांच्यासाठीं मुक्कामाची जागा हेरण्याकरितां आज्ञापटाचा कोश त्यांच्यापुढें तीन दिवसांच्या वाटेवर गेला. ३४ ते तळ हालवून मार्गस्थ होत तेव्हां परमेश्वराचा मेघ दिवसां त्यांजवर छाया करी.

३५ कोश पुढें जाण्यास निघाला म्हणजे मोशे म्हणत असे, हे परमेश्वरा, ऊठ, तुझ्या शत्रूंची दाणादाण होवो, आणि तुझे द्वेष्टे तुजपुढें पलायन करोत. ३६ कोश थांबला म्हणजे तो म्हणत असे, हे परमेश्वरा, इस्राएलाच्या सहस्रावधि लोकांकडे परत ये.

**११** १ मग लोक अरिष्ट प्राप्त झाल्यासारखे परमेश्वराच्या कानाशीं कुरकुरूं लागले; ते ऐकून परमेश्वराचा कोप भडकला आणि त्याच्या अग्नीनें त्यांजमध्यें पेट घेऊन छावणीच्या हद्दीवर असलेले लोक भस्म केले. २ तेव्हां लोकांनीं मोशापाशीं ओरड केली, आणि मोशानें परमेश्वराची प्रार्थना केली तेव्हां अग्नि शमला. ३ यावरून त्या स्थलाचें नांव तबेरा (दहन) असें पडलें, कारण परमेश्वराच्या अग्नीनें त्यांजमध्यें पेट घेतला होता.

४ त्यांच्यामध्यें जो मिश्र समुदाय होता त्यानें सोस घेतला; आणि इस्राएल लोकहि पुनः रडगाणें चालवून म्हणाले, आम्हांस खावयास मांस कोण देईल? ५ मिसर देशांत आम्हांस मासे अगदीं फुकट खावयाला मिळत त्याची आठवण आम्हांस होते; त्याप्रमाणेंच काकड्या, खरबुजें, शाकभाजी, कांदे, लसूण यांचीहि आम्हांस आठवण होते; ६ आमचा जीव सुकून गेला आहे; येथें कांहींच नाहीं; येथें पाहावें तों हा मान्नाखेरीज कांहींएक दृष्टीस पडत नाहीं. ७ हा मान्ना धण्यासारखा असून त्याचा रंग मोत्याच्या रंगासारखा होता. ८ लोक चोहोंकडे फिरून तो जमा करीत व जात्यांत दळीत किंवा उखळांत कुटीत आणि मग भांड्यांत शिजवून त्याच्या भाकरी करीत; तेलांत तळलेल्या पुरीसारखी त्याची चव असे. ९ रात्रीं तळावर दंव पडलें म्हणजे त्याबरोबर मान्ना पडत असे. १० सर्व कुटुंबांतील लोक आपआपल्या तंबूंच्या दारांशीं येऊन रडत आहेत व त्यांच्यावर परमेश्वराचा कोप फार भडकला आहे, हें मोशानें ऐकलें तेव्हां त्याला फार वाईट वाटलें. ११ मोशे परमेश्वरास म्हणाला: तूं आपल्या दासाला दुःख कां देत आहेस? तूं या सर्व लोकांचा भार मजवर घालीत आहेस, यावरून तुझी मजवर कृपादृष्टि नाहींशी दिसते; असें कां? १२ तूं मला सांगतोस कीं जसा पिता तान्ह्या बाळास वाहून नेतो तसें तूं यांस, यांच्या पूर्वजांस शपथपूर्वक देऊं केलेल्या देशाप्रत

आपल्या उराशीं धरून घेऊन जा; तर मीं या
सर्व लोकांचें गर्भधारण केलें आहे काय ? या सर्वांस मी
प्रसवलों आहे काय ? १३ या सर्व लोकांस पुरेल
एवढें मांस मी कोठून आणूं ? ते मजकडे रडगाणें
करीत आहेत कीं आम्हांस खावयास मांस दे.
१४ माझ्या एकट्याच्यानें या सर्व लोकांचा भार
साहवत नाहीं, तो मला अतिशयित जड जात आहे.
१५ मजशीं असेंच वर्तन ठेवण्याची तुझी इच्छा
असली तर मजवर तुझी कृपादृष्टि असल्यास मला
एकदाचा मारून टाक; माझी दुर्दशा मला पाहूं देऊं नको.
१६ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, तुझ्या माहितीं-
तले इस्राएल लोकांचे जे वडील व सरदार आहेत
त्यांतून सत्तर जण निवडून त्यांस दर्शनमंडपाच्या दारीं
घेऊन ये, व तेथें त्यांनीं तुजबरोबर उभें राहावें.
१७ मग मी उतरून तेथें तुजशीं भाषण करीन, आणि
तुझ्या ठायीं जो दैवी स्फूर्ति आहे तींतली कांहीं त्यांच्या
ठायीं घालीन म्हणजे तुझ्याबरोबर तेहि लोकांचा भार
उचलितील, मग तो तुला एकट्यालाच वाहावा लागणार
नाहीं. १८ तूं या लोकांस सांग कीं उद्यां तुम्ही शुद्ध
व्हा म्हणजे तुम्हांस मांस खावयास मिळेल. आम्हांला
खावयास मांस कोण देईल ? आम्ही आपले मिसरांत
बरें होतों; हें तुमचें रडगाणें परमेश्वराच्या कानीं गेलें
आहे, तर परमेश्वर तुम्हांस मांस देणार आणि तुम्ही
तें खाल. १९ तुम्ही तें केवळ एक दिवस, दोन दिवस,
पांच दिवस, दहा दिवस, वीस दिवस खाल, २० एवढेंच
नव्हे तर तुमच्या नाकांतून तें निघून तुम्हांस वीट
येईपर्यंत तें तुम्ही महिनाभर खात राहाल; कारण
तुमच्या ठायीं वसत असलेल्या परमेश्वराचा तुम्हीं
त्याग करून त्याच्यासमोर असें रडगाणें गाइलें कीं आम्ही
मिसर देशांतून निघालों कशाला ? २१ मोशे म्हणाला,
ज्या लोकांमध्यें मी आहें त्यांचें पायदळच सहा लाख
आहे आणि तूं म्हणतोस कीं ते महिनाभर खात
राहतील एवढें मांस मी त्यांस देईन. २२ त्यांस पुरें
पाडण्यासाठीं सर्व गुरेंढोरें व शेरडेंमेंढरें यांचा वध
करावा काय ? अथवा त्यांस पुरे पाडण्यासाठीं समुद्रां-
तील सर्व मासे त्यांच्यासाठीं धरून आणावे काय ?
२३ परमेश्वर मोशाला म्हणाला, परमेश्वराचा हात
तोकडा झाला आहे काय ? माझें म्हणणें तुझ्या प्रत्ययास
येतें कीं नाहीं हें तूं आतां पाहशील. २४ मोशानें
बाहेर जाऊन लोकांस परमेश्वराचें म्हणणें कळविलें;
मग त्यानें लोकांतल्या वडिलांपैकीं सत्तर जण निवडून
घेऊन तंबूभोवती उभें केले. २५ मग परमेश्वरानें
मेघाच्या ठायीं उतरून मोशाशीं भाषण केलें आणि त्याच्या
ठायींच्या दैवी स्फूर्तींतली कांहीं घेऊन त्या सत्तर
वडिलांच्या ठायीं घातली; तेव्हां त्यांजवर आत्मा
उतरतांच ते संदेश सांगूं लागले; त्यानंतर पुन्हां त्यांनीं
संदेश सांगितला नाहीं. २६ त्या वेळीं दोन पुरुष
छावणींतच राहिले होते, त्यांतील एकाचें नांव एलदाद व
दुसऱ्याचें नांव मेदाद असें होतें; त्यांच्यावरहि आत्मा
उतरला, ज्यांची नोंद झाली होती त्यांपैकीं ते होते,
पण ते तंबूकडे गेले नव्हते; ते छावणींतच संदेश
सांगूं लागले. २७ तेव्हां एका तरुण मनुष्यानें धावत
जाऊन मोशाला कळविलें कीं एलदाद व मेदाद हे
छावणींत संदेश सांगत आहेत. २८ तेव्हां मोशाचा
सेवक नूनाचा पुत्र यहोशवा जो त्याच्याजवळ तरुण-
पणापासून होता तो त्याला म्हणाला, मोशे, माझ्या
स्वामी, त्यांला मनाई कर. २९ मोशे त्यास म्हणाला,
माझ्याकरितां तूं त्यांचा हेवा करतोस काय ? परमेश्वराचे
सर्वच लोक संदेष्टे असते आणि परमेश्वरानें आपला
आत्मा त्या सर्वांच्या ठायीं घातला असता तर किती बरें
होतें ! ३० मग मोशे इस्राएलाच्या वडीलजनांसह
छावणींत गेला. ३१ नंतर परमेश्वरापासून वायु सुटला
व त्यानें समुद्रावरून लावे आणिले; ते छावणीवर व
तिच्यासभोवतीं इतके आले कीं छावणीच्या अलीकडे
पलीकडे एक दिवसाच्या मजलेपर्यंत जमिनीच्या
पृष्ठभागावरला दोन हात उंच प्रदेश त्यांनीं व्यापिला.
३२ तो सगळा दिवस, सगळी रात्र, दुसराहि
सगळा दिवस लोकांनीं उठून ते लावे गोळा केले;
ज्यानें सर्वांत कमी गोळा केले ते दहा होमर भरले;
आणि त्यांनीं ते सगळ्या छावणीच्या चोहों बाजूंस

पसरून ठेविलें. ३३ लाव्यांचें मांस त्यांच्या दाढांखालीं
असून ते आतां तें चावणार तों परमेश्वराचा क्रोध
त्यांजवर भडकला व त्यानें तीव्र पटकी पाठवून
त्यांचा संहार केला. ३४ त्या स्थलाचें नांव किब्रोथ-
हत्तव्वा ( सोस घेणाऱ्यांच्या कबरा ) असें पडलें, कारण
ज्या लोकांनीं सोस घेतला त्यांचीं प्रेतें त्या ठिकाणीं
पुरलीं होतीं. ३५ किब्रोथ-हत्तव्वा येथून कूच करून
हसेरोथ येथें जाऊन ते राहिले.

१२ १ मोशानें कुशी लोकांतली एक स्त्री बायको
केली होती म्हणून मिर्याम व अहरोन हीं त्याची
निंदा करूं लागलीं. २ तीं म्हणालीं, परमेश्वर
केवळ मोशाशींच बोलला आहे काय? आम्हांशीं नाहीं
का बोलला? हें त्यांचें बोलणें परमेश्वरानें ऐकलें.
३ मोशे हा पुरुष तर भूतलावरील सर्व मनुष्यांहून
नम्र होता. ४ परमेश्वरानें मोशे, अहरोन व मिर्याम
यांस एकाएकीं सांगितलें कीं तुम्ही तिघे दर्शनमंडपा-
कडे या. तेव्हां तीं तिघें तिकडे गेलीं. ५ परमेश्वर
मेघस्तंभांत उतरून तंबूच्या दाराशीं उभा राहिला व
त्यानें अहरोन व मिर्याम यांस बोलाविलें तेव्हां तीं
पुढें गेलीं. ६ परमेश्वर त्यांस म्हणाला, माझे शब्द
ऐका, तुमच्यामध्यें कोणी संदेष्टा असल्यास मी त्यास
दृष्टांतांत प्रगट होतों आणि स्वप्नांत मी त्याशीं भाषण
करितों; ७ पण माझा सेवक मोशे तसा नाहीं, माझ्या
सर्व घराण्यांत तो विश्वासू आहे. ८ मी त्याजशीं प्रत्यक्ष
स्पष्टपणें बोलत असतों, गूढ अर्थानें बोलत नसतों;
परमेश्वराचें स्वरूप माझा सेवक मोशे याच्या दृष्टीस
पडत असतां त्याची निंदा करावयास तुम्हांस भीति
कशी नाहीं वाटली? ९ मग परमेश्वराचा क्रोध त्यांजवर
भडकला व त्यानें तेथून गमन केलें. १० तंबूवरून
मेघस्तंभ निघून गेला तों इकडे मिर्याम कोडानें बर्फा-
सारखी पांढरी झाली; अहरोनानें मिर्यामेकडे पाहिलें
तों ती कोडी बनली आहे असें त्यास दिसलें. ११ मग
अहरोन मोशाला म्हणाला, माझ्या प्रभू, आम्हीं दोघांनीं
मूर्खपणानें वागून पातक केलें, त्याचा दोष आम्हांवर ठेवूं
नको. १२ शरीर अर्धें गलित झालें आहे असा कोणी
मनुष्य आईच्या पोटांतून निघतो त्याप्रमाणें ही मिर्याम
मृतवत् राहूं देऊं नको. १३ तेव्हां मोशानें परमेश्वराचा
धावा केला कीं, हे देवा, दया करून हिला बरें कर.
१४ परमेश्वर मोशाला म्हणाला, तिचा बाप तिच्या
तोंडावर केवळ थुंकला असता तर तिला निदान सात
दिवस लाज वाटली नसती काय? म्हणून सात दिवस
तिला छावणीबाहेर कोंडून ठेव, नंतर तिला छावणींत
येऊं दे. १५ त्याप्रमाणें मिर्याम हिला सात दिवस
छावणीबाहेर कोंडून ठेविलें; मिर्याम पुन्हा छावणींत
येईपर्यंत लोकांनी आपला तळ हालविला नाहीं.
१६ यानंतर हसेरोथ येथून कूच करून त्यांनीं पारान
नांवाच्या रानांत डेरे दिले.

१३ १ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, २ मी
इस्राएल लोकांस कनान देश देत आहें,
तो हेरण्यासाठीं मनुष्यें पाठीव; प्रत्येक वंशामागें
एक एक सरदार पाठीव. ३ परमेश्वराची मोशाला
आज्ञा झाली त्याप्रमाणें त्यानें पारान रानांतून लोक
पाठविले; ते सगळे इस्राएल लोकांचे सरदार होते.
४ त्यांचीं नांवें हीं: रऊबेन वंशांतला जाक्कुराचा पुत्र
शम्मुवा, ५ शिमोनाच्या वंशांतला होरीचा पुत्र शाफाट,
६ यहूदाच्या वंशांतला यफुन्नेचा पुत्र कालेब,
७ इस्साखाराच्या वंशांतला योसेफाचा पुत्र इगाल,
८ एफ्राइमाच्या वंशांतला नूनाचा पुत्र होशा,
९ बन्यामीन वंशांतला रापूचा पुत्र पाल्टी, १० जबुलून
वंशांतला सोदीचा पुत्र गाद्दीयेल, ११ योसेफ वंशांतल्या
मनश्शे कुळांतला सुसीचा पुत्र गाद्दी, १२ दान
वंशांतला गमाल्लीचा पुत्र आम्मीयेल, १३ आशेर
वंशांतला मिकाएलाचा पुत्र सतुर, १४ नफताली
वंशांतला वाप्सीचा पुत्र नाहब्बी, १५ आणि गादाच्या
वंशांतला माकीचा पुत्र गऊवेल. १६ देश हेरण्यास
मोशानें पुरुष पाठविले त्यांचीं नांवें हीं होतीं. नूनाचा
पुत्र होशा याचें मोशानें यहोशवा असें नांव ठेविलें.
१७ मोशानें त्यांस कनान देश हेरावयास पाठविलें.
तेव्हां त्यानें त्यांस सांगितलें कीं येथून दक्षिण देशावरून
पहाडी प्रांतांत जा; १८ आणि देश कसा आहे,

देशांतील रहिवासी बळकट आहेत कीं दुर्बल आहेत,
ते थोडे आहेत कीं फार आहेत, १९ ते लोक
रहातात तो देश बरा आहे कीं वाईट आहे, आणि
त्यांचीं वस्तीचीं नगरें उघडीं आहेत कीं तटबंदीचीं
आहेत, २० तसेंच तेथील भूमि सुपीक आहे कीं
नापीक आहे, त्यांत झाडेंझुडें आहेत कीं नाहींत हें
पाहून या. हिंमत धरा, व त्या देशचीं कांहीं फळें
घेऊन या. ते दिवस द्राक्षांच्या पहिल्या बहराचे होते.
२१ मग त्यांनीं जाऊन सीन रानापासून हमाथाच्या
वाटेवर रहोबापर्यंत सर्व देश हेरिला. २२ ते दक्षिण
प्रांतांतून हेब्रोनास गेले, तेथें अहीमन, शेशय आणि
तलमय हे अनाकाचे वंशज राहत होते; हें हेब्रोन
शहर मिसरांतील सोअन शहरापूर्वी सात वर्षे वसलें
होतें. २३ मग ते अश्कोल नाल्यापाशीं आले; तेथें
त्यांनीं द्राक्षांच्या घोसासहित एक फांदी तोडून घेतली
व ती दोन मनुष्यांनीं कावडीवर घालून वाहिली;
तसाच त्यांनीं डाळिंबें व अंजीर यांचाहि कांहीं मासला
घेतला. २४ इस्राएल लोक त्या ठिकाणाहून द्राक्षांचा
घोस तोडून घेऊन आले; यावरून त्या स्थलाचें नांव
अश्कोल (घोस) नाला असें पडलें. २५ देश हेरून ते
चाळीस दिवसांनीं परत आले. २६ ते हेर पारान
रानांतील कादेश येथें मोशे, अहरोन व इस्राएलाची सर्व
मंडळी यांजपाशीं येऊन दाखल झाले आणि त्यांनीं त्या
मंडळीस सर्व वृत्तांत सांगितला व त्या देशचीं फळें
त्यांस दाखविलीं. २७ त्यांनीं मोशाला सांगितलें: ज्या
देशीं तूं आम्हांस पाठविलें तो देश आम्हीं पाहिला;
त्यांत खरोखरच दुधामधाचे प्रवाह वाहत आहेत;
तेथलीं हीं फळें पाहा. २८ मात्र त्या देशचे रहिवासी
महाबलवान् आहेत आणि तेथलीं नगरें तटबंदीचीं असून
फार मोठीं आहेत; तेथें अनाकाचे वंशजहि आम्हीं
पाहिले. २९ दक्षिण प्रांतांत अमालेकाची वस्ती आहे;
पहाडी प्रदेशांत हित्ती, यबूसी आणि अमोरी हे
राहतात; आणि समुद्रकिनाऱ्यावर व यार्देनतीरीं कनानी
लोकांची वस्ती आहे. ३० तेव्हां मोशाच्या समोर
आलेल्या लोकांस शांत करून कालेब म्हणाला, आपण
त्या देशावर आतांच्या आतां चढाई करून जाऊन तो
घेऊं; तो जिंकण्यास आपल्याला ताकद आहे; ३१ पण
जे पुरुष त्याजबरोबर गेले होते ते म्हणाले, त्या
लोकांवर स्वारी करण्यास आपल्याला ताकद नाहीं,
कारण ते आपल्याहून बलाढ्य आहेत. ३२ त्याप्रमाणेंच,
जो देश हेरून ते आले त्याविषयीं इस्राएल लोकांस
त्यांनीं अशी अनिष्ट बातमी दिली कीं भूमि तेथील
रहिवाश्यांस ग्रासून टाकणारी आहे; तेथील लोक आम्हीं
पाहिले ते मोठे धिप्पाड आहेत. ३३ तेथें नफिलीम
राक्षस म्हणजे नफिली घराण्यांतील अनाकाचे
वंशज आम्हीं पाहिले; तेव्हां स्वतांच्या व त्यांच्या
दृष्टीनें आम्ही टोळांसारखे भासलों.

**१४**
१ तेव्हां सर्व मंडळीनें हेल काढून विलाप
केला आणि लोक रात्रभर रडले. २ सर्व इस्राएल
लोक मोशे आणि अहरोन यांच्याविरुद्ध कुरकुर
करूं लागले; ती सर्व मंडळी त्यांस म्हणाली: आम्ही
मिसर देशांत मेलों असतों किंवा याच रानांत मेलों
असतों तर बरें झालें असतें. ३ परमेश्वरानें आम्हांस
या देशांत कां आणिलें? तरवारीनें आमचा निःपात
व्हावा म्हणून काय? आमच्या स्त्रिया व मुलेंबाळें यांची
लूट होणार; मिसर देशीं परत जावें हें बरें नव्हे काय?
४ ते एकमेकांस म्हणाले, आपण कोणास तरी नायक
करून मिसर देशीं माघारीं जाऊं चला. ५ तेव्हां मोशे
आणि अहरोन इस्राएलाच्या सर्व मंडळीसमोर उपडे
पडले, ६ आणि देश हेरून आलेल्यांपैकीं नूनाचा पुत्र
यहोशवा व यफुन्नेचा पुत्र कालेब यांनीं आपलीं वस्त्रें
फाडिलीं; ७ आणि ते इस्राएल लोकांच्या सर्व मंडळीस
म्हणाले, जो देश हेरीत आम्ही चोहोंकडे फिरलों
तो अतिशयित उत्तम आहे. ८ परमेश्वर आम्हांवर
प्रसन्न झाला तर तो त्या दुधामधाचे प्रवाह वाहणाऱ्या
देशांत आम्हांस नेऊन तो देईल. ९ तुम्ही
परमेश्वराविरुद्ध बंड मात्र करूं नका, अथवा त्या देशाच्या
लोकांची भीति धरूं नका, ते आमचें भक्ष्य होणार,
त्यांचा आधार तुटला आहे, आम्हांबरोबर परमेश्वर
आहे; त्यांची भीति धरूं नका; १० पण सर्व मंडळी

म्हणूं लागली कीं यांला दगडमार करा. तेव्हां दर्शन-
मंडपांत परमेश्वराचें तेज सर्व इस्राएल लोकांच्या
दृष्टीस पडलें.
११ मग परमेश्वर मोशाला म्हणाला, हे लोक कोठ-
वर माझा तिरस्कार करणार? आणि यांच्यामध्यें मीं
दाखविलेलीं सगळीं चिन्हें पाहूनहि हे मजवर कोठवर
विश्वास ठेवणार नाहींत? १२ मी त्यांस मरीनें मारून
टाकितों व त्यांच्या वतनावरून त्यांचा वारसा काढून
टाकून तुझेंच त्यांच्याहून मोठें व प्रबळ राष्ट्र करितों.
१३ मोशे परमेश्वरास म्हणाला, तूं आपलें सामर्थ्य
दाखवून या लोकांस मिसरी लोकांतून काढून आणिलें
आहे, हें त्यांनीं ऐकलें आहे एवढेंच नव्हे तर
१४ हें त्यांनीं या देशच्या लोकांसहि कळविलें आहे;
त्यांनीं तर ऐकलेंच असेल कीं तूं परमेश्वर या लोकांच्या
ठायीं वसत असून त्यांस प्रत्यक्ष दर्शन देतोस, तुझा
मेघ त्यांजवर राहतो आणि दिवसा मेघस्तंभांत व
रात्रीं अग्निस्तंभांत राहून तूं त्यांच्यापुढें चालत
असतोस. १५ आतां तूं या लोकांस समूळ मारून
टाकिलें तर ज्या ज्या राष्ट्रांनीं तुझी कीर्ति ऐकली
आहे ते म्हणतील, १६ जो देश परमेश्वरानें या
लोकांस प्रतिज्ञेनें देऊं केला तेथें त्यांस त्याच्यानें घेऊन
जावबलें नाहीं म्हणून रानांतच त्यांस त्यानें मारून
टाकिलें. १७ तर आतां हे परमेश्वरा, तुझ्या म्हणण्या-
प्रमाणें तुझा महिमा दाखीव; तूं म्हटलें आहे कीं
१८ परमेश्वर मंदक्रोध, दयेचा सागर, अधर्म व
अपराध यांची क्षमा करणारा, जे दोषी असतील
त्यांच्या दोषांवर झाकण न घालणारा असा आहे; तो
वडिलांच्या अधर्माबद्दल पुत्रपौत्रांच्या तिसऱ्या व चौथ्या
पिढीपर्यंत समाचार घेतो. १९ तुझ्या थोर दयेनुसार
मिसर देशापासून येथपर्यंत जशी तूं या लोकांस अधर्माची
क्षमा केली तशी या वेळींहि त्यांच्या अधर्माची क्षमा
कर. २० परमेश्वर म्हणाला, तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी
करितों; २१ पण माझ्या जीविताची शपथ, अखिल
पृथ्वी भरून टाकणाऱ्या परमेश्वराच्या महिम्याची शपथ;
२२ या सर्व लोकांनीं माझा महिमा आणि मिसर
देशांत व रानांत मीं दाखविलेलीं चिन्हें पाहूनहि
दहादां माझी परीक्षा पाहिली आणि माझें सांगणें
ऐकलें नाहीं; २३ म्हणून जो देश मीं त्यांच्या पूर्वजांस
शपथपूर्वक देऊं केला आहे तो खरोखर त्यांच्या दृष्टीस
पडावयाचा नाहीं; माझा ज्यांनीं तिरस्कार केला ते
कोणीहि तो देश पाहणार नाहींत; २४ माझा दास
कालेब याची वृत्ति निराळी आहे व तो पूर्णपणें मला
अनुसरला आहे म्हणून ज्या देशांत तो गेला होता त्या
देशांत मी त्यास मात्र नेईन व त्याचा वंश तेथें वतन
पावेल. २५ अमालेकी व कनानी यांची तळवटींत
वस्ती आहे म्हणून उद्यां वळसा घेऊन कूच करा आणि
तांबड्या समुद्राच्या मार्गानें रानांत जा.
२६ परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस सांगितलें,
२७ ही जी दुष्ट मंडळी मजविरुद्ध कुरकुरत आहे तिचें
मी कोठवर सोसूं? हे जे इस्राएल लोक मजविरुद्ध
कुरकुरत आहेत त्यांच्या कुरकुरी माझ्या कानावर
आल्या आहेत; २८ म्हणून तूं त्यांस सांग, परमेश्वर
म्हणतो: माझ्या जीविताची शपथ, तुमचें म्हणणें
माझ्या कानीं आलें आहे तदनुरूप मी तुमचें करीन;
२९ तुमचीं प्रेतें या रानांत पडतील, आणि गणती-
प्रमाणें तुमच्या सर्वांपैकीं वीस वर्षांचे व त्यांहून अधिक
वयाचे मजविरुद्ध कुरकुर करणारे असे ३० तुम्ही
कोणीहि ज्या देशांत तुम्हांस वसवीन अशी मी शपथ
वाहिली आहे त्यांत जाणार नाहीं; यफुन्नेचा पुत्र कालेब
व नूनाचा पुत्र यहोशवा हे मात्र जातील. ३१ ज्या
तुमच्या मुलांबाळांविषयीं तुम्ही म्हणालां कीं यांची लूट
होईल त्यांस मी त्या देशीं पोंचवीन, आणि जो देश
तुम्हीं तुच्छ मानिला आहे तो देश ते भोगितील;
३२ पण तुमचीं स्वतांचीं प्रेतें या रानांत पडतील.
३३ तुमचीं प्रेतें या रानांत पडून नष्ट होत तोंपर्यंत
चाळीस वर्षें तुमचीं मुलेंबाळें तुमच्या व्यभिचाराचें
फळ भोगीत रानांत भटकत राहतील. ३४ देश
हेरावयाला जे चाळीस दिवस लागले त्यांतून प्रत्येक
दिवसाला एक वर्ष अशीं चाळीस वर्षें तुम्ही आपल्या
दुष्कर्मांचा भार वाहाल, आणि तुम्हांस माझ्या प्रतिकूल

तेचा अनुभव घडेल. ३५ मी परमेश्वर हें बोललों
आहें, जी दुष्ट मंडळी मजविरुद्ध जमली आहे तिचें मी
असें खरोखर करीन; तिचा या रानांत विध्वंस होईल,
ती मरून जाईल. ३६ नंतर मोशानें देश हेरण्यास
पाठविलेल्या ज्या पुरुषांनीं परत येऊन देशाविषयीं
अनिष्ट बातमी सांगितली होती आणि सर्व मंडळीस
परमेश्वराविरुद्ध कुरकुर करण्यास चिथविलें होतें,
३७ ते देशाची अनिष्ट बातमी देणारे पुरुष मरीनें
परमेश्वरासमोर मृत्यु पावले. ३८ तथापि देश
हेरावयास गेलेल्या पुरुषांपैकीं नूनाचा पुत्र
यहोशवा आणि यफुन्नेचा पुत्र कालेब हे जीवंत राहिले.
३९ मोशानें इस्राएल लोकांस हें सांगितलें तेव्हां त्यांनीं
फार विलाप केला. ४० मग ते मोठ्या पहाटेस उठले
आणि पर्वताच्या शिखरावर चढून म्हणाले, आमच्या-
कडून अपराध घडला पण आम्ही आतां तयार आहों;
परमेश्वरानें वचन दिलेल्या स्थानीं आम्ही जाऊं.
४१ तेव्हां मोशे म्हणाला, परमेश्वराच्या आज्ञेचें
उल्लंघन कां करितां? यांत तुम्हांस यश यावयाचें नाहीं.
४२ परमेश्वर तुमच्यामध्यें नाहीं म्हणून चढाई करूं
नका, कराल तर शत्रूकडून तुमचा संहार होईल.
४३ पाहा, तुमच्यापुढें अमालेकी व कनानी लोक आहेत
म्हणून तुम्ही तरवारीनें पडाल; तुम्ही परमेश्वराचें
अनुसरण करण्याचें सोडून मागें फिरलां आहां म्हणून
परमेश्वर तुम्हांबरोबर राहावयाचा नाहीं; ४४ पण ते
धिटाई करून पर्वताच्या शिखरावर चढले; तरी
परमेश्वराच्या कराराचा कोश आणि मोशे हे छावणींतून
हालले नाहींत. ४५ तेव्हां त्या पर्वतावर राहणारे
अमालेकी व कनानी यांनीं खालीं उतरून त्यांस मार
देत हर्मापर्यंत पिटाळून लाविलें.

१५ १ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्राएल
लोकांस सांग: मीं तुम्हांस तुमच्या वस्तीसाठीं
देऊं केलेल्या देशीं तुम्ही जाऊन पोहंचाल;
३ आणि परमेश्वराप्रीत्यर्थ गुरेंढोरें किंवा शेरडेंमेंढरें यांचें
सुवासिक हव्य करावें म्हणून परमेश्वराप्रीत्यर्थ हवन कराल,
मग तें होमबलीचें असो किंवा तो नवस फेडण्यासंबंधाचा,
खुशीनें दिलेल्या बलीसंबंधाचा किंवा तुमच्या नेमिलेल्या
सणांतला यज्ञ असो, ४ तेव्हां यज्ञ करणाऱ्यानें प्रत्येक
कोकराबरोबर परमेश्वराप्रीत्यर्थ एक चतुर्थांश हिनभर
तेलांत मळलेल्या एक दशांश एफा सपिठाचें अन्नार्पण
करावें, ५ आणि चतुर्थांश हिन द्राक्षारसाचें पेयार्पण करावें.
६ दर मेंढ्यामागें एक तृतीयांश हिन तेलांत
मळलेल्या दोन दशमांश एफा सपिठाचें अन्नार्पण करावें,
७ परमेश्वरास सुवासिक हव्य म्हणून एक तृतीयांश हिन
द्राक्षारसाचें पेयार्पण करावें. ८ तुम्ही परमेश्वराप्रीत्यर्थ
होमबलि अथवा नवस फेडण्यासाठीं बलि किंवा शांत्य-
र्पणांचा बलि म्हणून गोऱ्हा अर्पाल तेव्हां ९ गोऱ्ह्याचें
अर्पण करणाऱ्यानें त्याजबरोबर अर्धा हिन तेलांत
मळलेल्या तीन दशमांश एफा सपिठाचें अन्नार्पण करावें.
१० परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य म्हणून अर्धा हिन
द्राक्षारसाचें पेयार्पण करावें. ११ प्रत्येक गोऱ्हा, प्रत्येक
मेंढा, प्रत्येक कोकरूं व प्रत्येक करडूं यांसह वर
सांगितल्याप्रमाणें अर्पण करावें. १२ तुमच्या यज्ञपशूंच्या
संख्येप्रमाणें प्रत्येकासह याप्रमाणें अर्पण करावें.
१३ देशांत जन्मलेले कोणी परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक
हव्य अर्पितील त्या समयीं त्यांनीं असेंच करावें.
१४ तुमच्याबरोबर राहत असलेल्या अथवा पिढ्यान-
पिढ्या तुमच्यामध्यें वस्ती करून राहिलेल्या कोणा पर-
देशीयाला हें सुवासिक हव्य अर्पावयाची इच्छा झाली तर
तुमच्याप्रमाणेंच त्यानेंहि करावें. १५ एकंदर सर्व मंडळी-
साठीं म्हणजे तुम्हांसाठीं व तुम्हांबरोबर राहणाऱ्या पर-
देशीयासाठीं एकच विधि; तुमच्या पिढ्यानपिढ्या तुम्हांस
हा निरंतरचा विधि होय; परमेश्वराला जसे तुम्ही
तसाच परदेशीयहि होय. १६ तुम्हांसाठीं व तुमच्या-
बरोबर राहणाऱ्या परदेशीयासाठीं एकच नियम व एकच
विधि असावा.

१७ परमेश्वर मोशाला म्हणाला, १८ इस्राएल लोकांस
सांग: ज्या देशांत मी तुम्हांस नेत आहें तेथें १९ त्या
देशांतलें अन्न खाल तेव्हां तुम्ही त्यांतलें कांहीं परमेश्वरा-
प्रीत्यर्थ समर्पित अंश म्हणून अर्पावें. २० प्रथम

मळलेल्या कणिकेची एक पापडी परमेश्वराप्रीत्यर्थ समर्पित
अंश म्हणून अर्पावी; तुम्हीं आपल्या खळ्यांतला समर्पित
अंश म्हणून अर्पितां त्याप्रमाणें ही अर्पावी. २१ तुम्हीं
पिढ्यानपिढ्या आपल्या प्रथम मळलेल्या कणिकेचा
कांहीं भाग समर्पित अंश म्हणून परमेश्वराला अर्पावा.

२२ परमेश्वरानें मोशास दिलेल्या या सगळ्या
आज्ञांपैकीं कोणतीहि जर तुम्ही कोणी चुकून मोडाल,
२३ म्हणजे अर्थात् मोशाच्या द्वारें परमेश्वर आज्ञा देऊं
लागला त्या दिवसापासून पुढें तुमच्या एकंदर पिढ्यान-
पिढ्या परमेश्वराकडून मिळालेल्या ज्या सगळ्या आज्ञा
त्यांपैकीं एकादी चुकून मोडाल, २४ आणि मंडळीस
नकळत ही चूक घडली असली, तर सर्व मंडळीनें परमे-
श्वरास सुवासिक हव्य म्हणून एका गोऱ्ह्याचा होमबलि
द्यावा व त्याबरोबर नियमानुसार त्याचें अन्नार्पण व
पेयार्पण द्यावें आणि पापार्पणासाठीं एक बकरा द्यावा.
२५ मग याजकानें इस्राएल लोकांच्या सर्व मंडळीसाठीं
प्रायश्चित्त करावें, म्हणजे त्यांस क्षमा होईल; कारण
त्यांचें पाप केवळ चुकून झालें असून त्यांनीं आपल्या ह्या
चुकीबद्दल आपलें अर्पण म्हणजे परमेश्वराप्रीत्यर्थ हव्य
आणि आपला पापबलि त्याजसमोर अर्पिला आहे.
२६ त्याचप्रमाणें इस्राएल लोकांच्या सर्व मंडळीचें व
त्यांच्यामध्यें वस्ती करणाऱ्या परदेशीयांचेंहि पाप क्षमा
करण्यांत येईल; कारण या सर्व लोकांसंबंधानें ही चूक
नकळत झालेली आहे. २७ कोणी एकादा मनुष्य
चुकीनें पाप करील तर त्यानें एक वर्षाची बकरी
पापबलि म्हणून अर्पावी. २८ याजकानें त्या चुकून
पाप करणाऱ्यासाठीं परमेश्वरासमोर प्रायश्चित्त करावें.
२९ चुकून कांहीं कृत्य करणारा, मग तो इस्राएल
लोकांत जन्म पावलेला स्वदेशीय असो किंवा तुमच्यांत
राहणारा परदेशीय असो, त्या सर्वांविषयीं तुम्हांस
एकच नियम. ३० जाणूनबुजून कांहीं कृत्य
करणारा पुरुष, मग तो स्वदेशीय असो कीं परदेशीय
असो, परमेश्वराची निंदा करणारा होय; त्या मनुष्याचा
स्वजनांतून उच्छेद व्हा. ३१ जो परमेश्वराचें वचन
तुच्छ समजतो व त्याच्या आज्ञा मोडितो त्याचा सर्वस्वीं
उच्छेद व्हावा; त्याच्या दुष्कर्माचें त्याला फळ मिळेल.

३२ इस्राएल लोक रानांत राहत होते तेव्हां एका
शब्बाथवारीं एक मनुष्य लाकडें गोळा करितांना
आढळला. ३३ ज्यांस तो मनुष्य लाकडें गोळा करितांना
आढळला ते त्यास मोशे, अहरोन व सर्व मंडळी यांज-
कडे घेऊन गेले. ३४ त्यांनीं त्यास अटकेंत ठेविलें,
कारण असल्या मनुष्याचें काय करावें याविषयीं कांहीं
स्पष्ट सांगितलें नव्हतें. ३५ तेव्हां परमेश्वरानें मोशाला
सांगितलें, ह्या मनुष्याला अवश्य जिवें मारावें;
मंडळीच्या सर्व लोकांनीं छावणीबाहेर त्यास दगडमार
करावा. ३६ तेव्हां सर्व मंडळीनें त्यास छावणीबाहेर
नेऊन दगडमार केला आणि तो मेला; परमेश्वरानें
मोशाला आज्ञा दिली तसें त्यांनीं केलें.

३७ परमेश्वर मोशाला म्हणाला, ३८ इस्राएल
लोकांस आज्ञा कर कीं त्यांनीं पिढ्यानपिढ्या आपल्या
वस्त्रांच्या काठांस गोंडे लावावे, आणि प्रत्येक
काठाच्या गोंड्यांवर निळ्या रंगाची फीत लावावी;
३९ ह्या गोंड्यांचा उद्देश असा कीं ते तुमच्या नजरेस
पडून परमेश्वराच्या सगळ्या आज्ञांचें तुम्हांस स्मरण
व्हावें, व तुम्हीं त्याच्या आज्ञा पाळाव्या; आपल्या
मनास येईल तसा व आपल्या नजरेस येईल तसा
तुम्ही व्यभिचार करीत आलां तसा करूं नये; ४० तर
तुम्हीं परमेश्वराच्या सर्व आज्ञांची आठवण करून त्या
पाळाव्या व आपल्या देवाप्रीत्यर्थ पवित्र व्हावें. ४१ तुमचा
देव व्हावा म्हणून ज्यानें तुम्हांस मिसर देशांतून
बाहेर आणिलें तो मी परमेश्वर तुमचा देव आहें.

१६

१ कोरह बिन इसहार बिन कहाथ बिन
लेवी, आणि रऊबेन वंशांतील अलीयाबाचे पुत्र
दाथान व अबीराम आणि ओन बिन पेलेथ
२ हे इस्राएल मंडळींतले कांहीं लोक म्हणजे मंडळीचे
अडीचशें सरदार बरोबर घेऊन मोशावर उठले; हे
सरदार लोकप्रतिनिधि असून अब्रूदार पुरुष होते;
३ ते मोशे व अहरोन यांजविरुद्ध उठून त्यांस म्हणाले,
तुम्ही फारच आढ्यता मिरवितां. ४ मंडळींतील प्रत्येक

मनुष्य पवित्र आहे आणि परमेश्वर त्यांच्या ठायीं आहे,
तर तुम्ही परमेश्वराच्या मंडळीवर वर्चस्व कां चालवितां?
हें ऐकून मोशे उपडा पडला, ५ तो कोरह व त्याचे
साथीदार यांस म्हणाला, परमेश्वराचे कोण व पवित्र
कोण हें परमेश्वर उद्यां सकाळीं दाखवील व त्यांस
आपल्यासमीप येऊं देईल; ज्यांस तो निवडील त्यांस
तो आपल्यासमीप येऊं देईल. ६ तर आतां, हे कोरह,
तूं आणि तुझे सर्व सोबती धुपाटणीं घ्या; ७ आणि
उद्यां त्यांत अग्नि ठेवून परमेश्वराला धूप दाखवा; मग
परमेश्वर ज्यास निवडून घेईल तोच पवित्र ठरेल;
लेव्याचे वंशजहो, तुम्हीच आढ्यता मिरविणारे आहां.
८ मग मोशे कोरहास म्हणाला, लेव्याचे वंशजहो, ऐका:
९ तुम्हीं परमेश्वराच्या निवासमंडपाची सेवा करावी
आणि मंडळीची सेवा करण्यासाठीं त्याजसमोर उभें राहावें
म्हणून परमेश्वरानें तुम्हांस आपल्यासमीप येऊं दिलें;
या कार्यासाठीं परमेश्वरानें तुम्हांस इस्राएल लोकांच्या
मंडळींतून वेगळें केलें हें थोडें झालें काय? १० तुला
व तुझ्या सर्व लेवीय भाऊबंदांस परमेश्वरानें आपल्या-
समीप घेतलें असून याजकाचें पदहि तुम्ही मिळवूं
पाहतां काय? ११ यासाठींच तूं आणि तुझ्या-
बरोबरची सर्व मंडळी परमेश्वरावर उठली आहे;
अहरोन तो काय कीं तुम्ही त्याजविरुद्ध कुरकुर करीत
आहां? १२ मोशानें अलीयाबाचे पुत्र दाथान व अबीराम
यांस बोलावणें पाठविलें, पण त्यांनीं म्हटलें, आम्ही येत
नाहीं; १३ तूं आम्हांस या रानांत मारून टाकण्यासाठीं
दुधामधाचे प्रवाह वाहणाऱ्या देशांतून काढून आणिलें हें
थोडें झालें म्हणून आमच्यावर आधिपत्य चालवितोस?
१४ शिवाय, दुधामधाचे प्रवाह वाहणाऱ्या देशांत
तूं आम्हांस मुळींच आणिलें नाहीं अथवा शेतें व
द्राक्षमळे यांचें वतन आम्हांस दिलें नाहीं; या लोकांचे
डोळे अंधळे करितोस काय? आम्ही येत नाहीं.
१५ तेव्हां मोशाचा कोप भडकला व तो परमेश्वरास
म्हणाला, त्यांच्या अर्पणाकडे पाहूं देखील नको; मीं
त्यांतल्या कोणाचें एक गाढवहि घेतलें नाहीं, कोणाची
कांहींएक हानि केली नाहीं. १६ मग मोशे कोरहास
म्हणाला, तूं उद्यां आपल्या सर्व मंडळीसह अहरोना-
बरोबर परमेश्वरासमोर हजर हो; १७ तुम्ही सर्व
आपआपलीं धुपाटणीं घेऊन त्यांत धूप घाला; प्रत्येकानें
आपलें धुपाटणें ह्याप्रमाणें दोनशें पन्नास धुपाटणीं
परमेश्वरासमोर आणावीं; तूं आणि अहरोन यांनींहि
आपआपलें धुपाटणें आणावें. १८ तेव्हां त्यांनीं
आपआपलें धुपाटणें घेऊन त्यांत विस्तव ठेविला व त्यावर
धूप घातला आणि मोशे व अहरोन यांजबरोबर ते
दर्शनमंडपाच्या दाराशीं उभे राहिले. १९ कोरहानें
त्यांच्याविरुद्ध असलेली सगळी मंडळी दर्शनमंडपाच्या
दाराशीं जमविली, तेव्हां परमेश्वराचें तेज सर्व
मंडळीस दिसलें.

२० परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस सांगि-
तलें, २१ तुम्ही या मंडळींतून निराळे व्हा म्हणजे
एका क्षणांत मी त्यांस भस्म करितों. २२ तेव्हां ते
उपडे पडून म्हणाले, हे देवा, सर्व जीवात्म्यांच्या देवा,
एका मनुष्यानें पाप केलें म्हणून सर्व मंडळीवर क्षोभ
करितोस काय? २३ मग परमेश्वर मोशाला म्हणाला,
२४ मंडळीस सांग कीं तुम्ही कोरह, दाथान व अबी-
राम यांच्या डेऱ्यांपासून दूर निघून जा. २५ तेव्हां
मोशे उठून दाथान व अबीराम यांजकडे गेला आणि
इस्राएल लोकांचे वडील त्याच्या पाठोपाठ गेले. २६ तो
मंडळीस म्हणाला, तुम्ही या दुष्ट मनुष्यांच्या डेऱ्या-
पासून दूर व्हा, त्यांच्या कोणत्याहि वस्तूला शिवूं देखील
नका; शिवलां तर तुम्ही सर्व त्यांच्या पापांत सांपडून
भस्म व्हाल. २७ मग ते कोरह, दाथान व अबीराम
यांच्या डेऱ्यांभोवतालून निघून गेले; आणि दाथान व
अबीराम बाहेर निघून आपल्या बायकांमुलांसह
आपल्या डेऱ्यांच्या दारीं उभे राहिले. २८ तेव्हां मोशे
म्हणाला, मीं हीं सर्व कामें आपल्याच मनानें केलीं
नाहींत; तर हीं करावयास परमेश्वरानें मला पाठविलें
आहे हें यावरून तुम्हांस दिसून येईल; २९ इतर
मनुष्यांच्या मृत्यूप्रमाणें यांस मृत्यु प्राप्त झाला किंवा
इतर सर्व लोकांप्रमाणेंच यांचें पारिपत्य झालें तर परमे-
श्वरानें मला पाठविलें नाहीं असें समजा; ३० पण

परमेश्वरानें कांहीं अद्भुत गोष्ट घडविली आणि पृथ्वीनें
आपलें तोंड उघडून यांस व यांच्या सर्वस्वास ग्रासून
टाकिलें आणि हे अधोलोकीं जीवंत जाऊन पडले, तर
असें समजा कीं या लोकांनीं परमेश्वराला तुच्छ मानिलें
आहे. ३१ हे त्याचे सगळे शब्द बोलून संपतात तोंच
त्या लोकांच्या पायांखालची भूमि दुभंग झाली,
३२ आणि पृथ्वीनें तोंड पसरून ते, त्यांचीं कुटुंबें,
कोरहाचीं सगळीं माणसें व त्यांची सर्व मालमत्ता ग्रासून
टाकिली. ३३ ते व त्यांचीं सगळीं माणसें जिवंत
अधोलोकीं जाऊन पडलीं आणि पृथ्वीनें त्यांस गडप
केलें आणि मंडळींतून तीं नष्ट झालीं. ३४ त्यांच्या
सभोंवतीं असलेले सर्व इस्राएल लोक त्यांचा आक्रोश
ऐकून पळून गेले. पृथ्वी आम्हालाहि गिळून टाका-
वयाची असें ते म्हणाले. ३५ मग परमेश्वरापासून
अग्नि निघाला. त्यानें ते धूप जाळणारे दोनशें पन्नास
पुरुष भस्म केले.

३६ परमेश्वर मोशाला म्हणाला, ३७ अहरोन
याजकाचा पुत्र एलाजार यास सांग कीं धुपाटणीं अग्नींतून
काढ व तो अग्नि विखरून टाक, कारण तीं पवित्र
आहेत; ३८ पाप करून आपल्या जिवास मुकले त्यांचीं
तीं धुपाटणीं घेऊन त्यांचे पत्रे ठोकून वेदी मढीव,
कारण त्यांनीं तीं परमेश्वराला समर्पण केल्यामुळें पवित्र
आहेत; इस्राएल लोकांस हीं चिन्हादाखल होतील.
३९ जीं पितळेचीं धुपाटणीं अग्नीनें भस्म झालेल्या त्या
पुरुषांनीं अर्पिलीं होतीं तीं घेऊन एलाजार याजकानें
त्यांचे पत्रे ठोकले व वेदी मढविली; ४० याचा हेतु
असा कीं अहरोन वंशाचा नव्हे असा कोणी परक्यानें
परमेश्वरासमोर धूप जाळण्यास जाऊं नये याचें स्मरण
इस्राएल लोकांस राहावें; आणि परमेश्वरानें मोशाच्या
द्वारें सांगितल्याप्रमाणें कोरहाची व त्याच्या सोबत्यांची
गति झाली तशी कोणाची होऊं नये.

४१ दुसरे दिवशीं इस्राएल लोकांची सर्व मंडळी
मोशे आणि अहरोन यांजवर उलटून त्यांस म्हणाली,
तुम्हीं परमेश्वराच्या लोकांस मारून टाकिलें आहे.
४२ मंडळींतील लोक मोशे आणि अहरोन यांजविरुद्ध
जमा झाल्यावर दर्शनमंडपाकडे त्यांनीं दृष्टि केली तों
त्यावर मेघानें छाया केली आहे आणि परमेश्वराचें
तेज प्रगट झालें आहे असें त्यांस दिसून आलें. ४३ मग
मोशे आणि अहरोन दर्शनमंडपासमोर गेले, ४४ तेव्हां
परमेश्वरानें मोशास सांगितलें, ४५ तुम्ही ह्या मंडळींतून
एकीकडे व्हा, म्हणजे एका क्षणांत मी त्यांस भस्म
करितों; तेव्हां ते उपडे पडले. ४६ मग मोशानें अह-
रोनास सांगितलें, धुपाटणें घेऊन त्यांत वेदीवरला
अग्नि घाल व त्यावर धूप ठेवून त्वरेनें तो मंडळीकडे
नेऊन त्यांच्यासाठीं प्रायश्चित्त कर, कारण परमेश्वराचा
कोप भडकला आहे व मरी सुरू झाली आहे.
४७ मोशाच्या आज्ञेप्रमाणें अहरोन धुपाटणें घेऊन
धावत मंडळीकडे गेला, आणि लोकांत मरी पसरत आहे
हें पाहून त्यानें धूप घालून लोकांसाठीं प्रायश्चित्त केलें.
४८ मृत आणि जीवंत यांच्यामध्यें तो उभा राहिला
तेव्हां मरी शमली. ४९ कोरहाच्या प्रकरणांत जे मेले
त्यांखेरीज मरीनें चौदा हजार सातशें लोक मेले.
५० तेव्हां मरी थांबली, आणि अहरोन दर्शन-
मंडपाच्या दाराशीं मोशाकडे परत गेला.

**१७** १ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्राएल
लोकांशीं बोल आणि त्यांच्या पूर्वजांच्या घराण्यां-
प्रमाणें त्यांच्या सर्व सरदारांपैकीं प्रत्येकाची
एक एक अशा बारा काठ्या घे आणि त्यांच्या त्यांच्या
काठीवर त्या प्रत्येकाचें नांव लिही; ३ लेव्याच्या काठी-
वर अहरोनाचें नांव लिही; कारण इस्राएलांच्या पितृ-
कुळांतील प्रत्येक सरदाराची एक एक काठी घ्याव-
याची. ४ आणि दर्शनमंडपांतील आज्ञापटासमोर जेथें
मी तुम्हांस दर्शन देत असतों तेथें त्या काठ्या ठेव.
५ ज्या पुरुषास मी पसंत करीन त्याच्या काठीस अंकुर
फुटतील; इस्राएल लोक तुम्हांविरुद्ध कुरकुरत आहेत,
तें त्यांचें कुरकुरणें मी बंद करीन. ६ मोशानें इस्राएल
लोकांस ही गोष्ट सांगितली व त्यांच्या सर्व सरदारांनीं
आपआपल्या पितृकुळाप्रमाणें प्रत्येकामागें एक एक
काठी अशा एकंदर बारा काठ्या दिल्या; या काठ्यांत

अहरोनाची काठी होती. ७ या काठ्या मोशानें आज्ञा-
पटाच्या तंबूंत परमेश्वरापुढें ठेविल्या. ८ दुसरे दिवशीं
सकाळीं मोशे आज्ञापटाच्या तंबूंत गेला आणि पाहतो
तों लेवी घराण्यांतील अहरोनाच्या काठीस अंकुर फुटले
असून ती फुलली आहे व तिला बदाम येऊन ते
पिकले आहेत. ९ तेव्हां मोशानें त्या सर्व काठ्या परमे-
श्वरासमोरून काढून इस्राएल लोकांकडे नेल्या; व
त्यांनीं आपआपली काठी पाहून घेतली. १० मग
परमेश्वरानें मोशाला सांगितलें: अहरोनाची काठी
आज्ञापटासमोर परत ठेवून दे; ह्या बंडखोरांस ती
चिन्ह म्हणून ठेवावी: अशानें ते मजविरुद्ध जी कुरकुर
करीत आहेत ती तूं बंद करिशील, म्हणजे ते मराव-
याचे नाहींत. ११ मोशानें तसें केलें, परमेश्वरानें त्यास
आज्ञा केली होती तसें त्यानें केलें.

१२ मग इस्राएल लोक मोशास म्हणूं लागले,
पाहा, आमचा प्राण चालला आहे, आमचा नाश
झाला आहे, आम्हीं सर्वच नष्ट झालों आहों. १३
जो कोणी परमेश्वराच्या निवासमंडपाजवळ जातो
त्यास मृत्यु प्राप्त होतो: आम्हां सर्वांचा आतां अंत
होणार कीं काय?

१ परमेश्वरानें अहरोनास सांगितलें, पवित्र-
**१८** स्थानासंबंधानें कांहीं अधर्म झाला तर त्याचा
दोष तुजवर व तुझे पुत्र आणि पितृकुळ
यांजवर; त्याप्रमाणेंच याजकपणासंबंधानें कांहीं अधर्म
झाला तर त्याचा दोष तुजवर व तुझ्या पुत्रांवर. २ लेवीचें
कुळ म्हणजे तुझ्या मूळपुरुषाच्या कुळांतले जे तुझे बांधव
आहेत त्यांनीं तुजशीं मिळून तुझी सेवा करावी; म्हणून
त्यांसहि आपल्यासमीप घेऊन ये: पण आज्ञा-
पटाच्या तंबूपुढें तूं व तुझे पुत्र यांनींच राहावें.
३ तुला जें कांहीं सोपलें आहे त्याचें व सगळ्या तंबूचें
रक्षण त्यांनीं करावें, पण पवित्रस्थानाच्या पात्रांशीं
व वेदीपाशीं त्यांनीं येऊं नये, आले तर ते व तुम्हीहि
मराल. ४ त्यांनीं तुजशीं मिळून दर्शनमंडपांतील सर्व
सेवेच्या वस्तूंची राखण करावी, पण परक्यानें तुम्हांजवळ
येऊं नये. ५ पवित्रस्थान व वेदी यांची राखण तुम्हीच
करावी म्हणजे इस्राएल लोकांवर पुन्हा कोप व्हावयाचा
नाहीं. ६ मींच स्वतः तुमच्या लेवी बांधवांस इस्राएल
लोकांतून निवडून घेतलें आहे आणि दर्शनमंडपाची
सेवा करावयासाठीं परमेश्वरास ते वाहिलेले असून मीं
तुम्हांस ते दान म्हणून दिले आहेत. ७ पण वेदीच्या
अथवा अंतरपटाच्या आंत जें कांहीं आहे त्याच्याप्रीत्यर्थ
तूं आणि तुझे पुत्र यांनीं आपला याजकपणा संभाळावा;
तुम्हीं सेवा करावी, कारण मीं याजकपणा हा तुम्हांस
सेवादान म्हणून दिला आहे; कोणी परका जवळ आला
तर त्यास जिवें मारावें.

८ परमेश्वरानें अहरोनाला सांगितलें, पाहा: मला
केलेल्या समर्पणांतून जो अंश काढून ठेवितात तो
म्हणजे अर्थात् इस्राएल लोकांच्या पवित्र केलेल्या सर्व
वस्तु तुला व तुझ्या वंशजांना वांटा म्हणून दिल्या
आहेत, तो तुमचा निरंतरचा हक्क होय. ९ ज्या परमपवित्र
वस्तूंचा अग्नींत होम करावयाचा नाहीं त्यांतून तुझ्या
ह्या इस्राएल लोकांच्या अर्पणांपैकीं सर्व अन्नार्पणें, सर्व
पापार्पणें आणि सर्व दोषार्पणें जीं ते मला अर्पितील
तीं तुझ्या व तुझ्या पुत्रांप्रीत्यर्थ परमपवित्र होत.
१० त्या वस्तु पवित्र समजून खाव्या; तुमच्यांतल्या
प्रत्येक पुरुषानें त्या खाव्या; त्या तुला पवित्र होत.
११ त्याप्रमाणेंच पुढील वस्तुहि तुझ्याच: इस्राएल
लोकांच्या अर्पणांतले जे समर्पिलेले व ओवाळून अर्पिलेले
अंश ते सगळे तुला, तुझ्या पुत्रांला व तुझ्या कन्यांला
निरंतरचा हक्क म्हणून देतों: तुझ्या घराण्यांतले जे
कोणी शुचि असतील त्यांनीं ते खावे. १२ उत्तम निरें
तेल, उत्तम नवा द्राक्षारस आणि गहूं यांचा जो प्रथम
उपज लोक परमेश्वरास अर्पितील तो मीं तुम्हांस दिला
आहे. १३ ते आपल्या देशांतील हरतऱ्हेचा प्रथम
उपज परमेश्वराप्रीत्यर्थ आणितील तो तुझा होय; तुझ्या
घराण्यांत जे कोणी शुद्ध असतील त्यांनीं तो खावा.
१४ इस्राएल लोकांनीं देवाला वाहिलेली प्रत्येक वस्तु
तुझीच होय. १५ मातेच्या पोटीं प्रथम जन्मलेले सर्व
प्राणी, मग ते मनुष्य असोत कीं पशु असोत, परमे-

श्वराला अर्पावयाचे ते सर्व तुझे होत; पण प्रथम जन्मलेले मनुष्य आणि प्रथम जन्मलेले अशुद्ध पशु खंड घेऊन सोडून द्यावे. १६ ज्यांना खंड घेऊन सोडावयाचे ते एक महिन्याचे झाले म्हणजे त्यांच्याबद्दल ठरविलेलें मोल पवित्रस्थानांतील शेकेलाच्या चलनाप्रमाणें पांच शेकेल म्हणजे वीस गेरा घेऊन त्यांना सोडून द्यावें; १७ पण गाईचा, मेंढीचा अथवा बकरीचा प्रथम वत्स सोडून देऊं नये, तो पवित्र आहे म्हणून त्याचें रक्त वेदीवर शिंपडावें आणि त्याच्या वपेचा परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य म्हणून होम करावा. १८ त्याचें मांस तुझें होय; ओवाळणीचा ऊर व उजवा फरा जसा तुझा तसें हेंहि तुझेंच होय. १९ या प्रकारें पवित्र वस्तूंतून जितका समर्पित अंश म्हणून इस्राएल लोक परमेश्वराला अर्पितील तितक्या सर्वांवर तुझा, तुझ्या पुत्रांचा व तुझ्या कन्यांचा निरंतरचा हक्क आहे असें मी नेमून देतों; हा तुजशीं व तुझ्या वंशजांशीं परमेश्वरानें मिठाचा करार निरंतरचा केला आहे. २० परमेश्वरानें अहरोनास सांगितलें, इस्राएल लोकांच्या जमिनीचें कांहीं वतन तुला मिळावयाचें नाहीं; इस्राएल लोकांत मीच तुझा वांटा व वतन आहें.

२१ दर्शनमंडपाची सेवा लेवीचे वंशज करितात तीबद्दल इस्राएल लोकांचे जे दशमांश येतात तेच वतन म्हणून त्यांस मीं नेमून दिले आहेत. २२ इस्राएल लोकांनीं यापुढें दर्शनमंडपाजवळ येऊं नये, आले तर त्यांस पाप लागून ते मरतील. २३ तर लेव्यांनीं दर्शनमंडपाची सेवा करावी; लोकांच्या अधर्माचा दोष त्यांजवर; हा तुमचा पिढ्यानपिढ्या निरंतरचा विधि होय; लेव्यांस इस्राएल लोकांत कांहीं वतन नसावें. २४ कारण इस्राएल लोक जे दशमांश समर्पित अंश म्हणून परमेश्वराला अर्पितात, ते लेव्यांचे भाग म्हणून मीं त्यांस नेमून दिले आहेत; म्हणूनच मीं त्यांस सांगितलें आहे कीं इस्राएल लोकांमध्यें तुम्हांस वतन मिळावयाचें नाहीं

२५ परमेश्वर मोशाला म्हणाला, २६ तूं लेव्यांस सांग कीं मी इस्राएलांचे दशमांश तुमचें वतन म्हणून तुम्हांस देतों, ते तुमच्या हातीं आले म्हणजे तुम्हीं त्या दशमांशाचा दशमांश परमेश्वरास समर्पित अंश म्हणून अर्पावा. २७ तुमचा समर्पित अंश खळ्यांतलें धान्य व रसकुंडांतला द्राक्षारस यांसारखा तुमच्या हिशोबीं गणिला जाईल. २८ इस्राएल लोकांकडून जे सर्व दशमांश तुम्हास मिळतील त्यांतून कांहीं परमेश्वराला समर्पित अंश म्हणून अर्पावे; हें परमेश्वरास समर्पित अंश म्हणून केलेलें अर्पण अहरोन याजकास द्यावें. २९ जीं सर्व अर्पणें तुम्हांस मिळतील त्यांतून सगळा समर्पित अंश परमेश्वराला अर्पावा, हा पवित्र केलेल्या म्हणजे उत्तम भागांतून घ्यावा. ३० तूं लेव्यांस सांग कीं जेव्हां तुम्ही हा उत्तम भाग समर्पित अंश म्हणून अर्पाल तेव्हां हें तुमचें करणें खळ्यांतील धान्य व रसकुंडांतील द्राक्षारस यांच्या अर्पणाप्रमाणें गणण्यांत येईल. ३१ हीं सर्व अर्पणें तुम्हीं व तुमच्या सगळ्या घराण्यांनीं कोणत्याहि स्थळीं खावीं, कारण दर्शनमंडपाची सेवा तुम्ही कराल तिचा हा मोबदला आहे. ३२ तुम्ही त्यांतील उत्तम भाग समर्पित अंश म्हणून अर्पण केला म्हणजे त्याच्यामुळें तुम्हांस पाप लागणार नाहीं; इस्राएलांच्या कोणत्याहि पवित्र वस्तु तुमच्या हातून अपवित्र होणार नाहींत व तुम्ही मरणार नाहीं.

**१९** १ परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस सांगितलें, २ परमेश्वरानें दिलेल्या नियमशास्त्राचा विधि हा: इस्राएल लोकांस सांग कीं जिला कांहीं व्यंग किंवा दोष नाहीं आणि जिच्यावर अद्यापि जूं ठेविलें नाहीं अशी एक पोवळ्या रंगाची कालवड मजकडे घेऊन या; ३ ती एलाजार याजकाकडे द्यावी; त्यानें तिला छावणीबाहेर घेऊन जावें व कोणींतरी त्याच्यासमोर तिला वधावें; ४ मग एलाजार याजकानें आपल्या बोटास तिचें थोडेंसें रक्त लावून तें सात वेळां दर्शनमंडपाच्या समोरच्या दिशेकडे शिंपडावें; ५ व त्याच्यासमोर त्या कालवडीचें कातडें, मांस, रक्त व शेण हीं कोणींतरी जाळून टाकावीं. ६ मग याजकानें

गंधसरूचें लाकूड, एजोब व किरमिजी रंग हीं घेऊन
कालवड जळत असेल त्या अग्नींत टाकावीं. ७ नंतर
याजकानें आपलीं वस्त्रें धुऊन पाण्यानें आपलें अंग
धुवावें आणि छावणींत यावें; पण संध्याकाळपर्यंत त्यानें
अशुचि राहावें. ८ त्याप्रमाणेंच ज्या मनुष्यानें ती
कालवड जाळिली असेल त्यानेंहि पाण्यानें आपलीं वस्त्रें व
अंग धुवावें व संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें. ९ मग
निर्मळ असलेल्या एकाद्या मनुष्यानें त्या कालवडीची राख
जमा करून छावणीच्या बाहेर स्वच्छ अशा एका ठिकाणीं
ठेवावी; ही राख इस्राएल लोकांच्या उपयोगाकरितां
अशौचक्षालनाचें पाणी तयार करण्यासाठीं म्हणून
ठेवावी; ही कालवड पापबलि होय. १० जो मनुष्य
त्या कालवडीची राख जमा करील त्यानें आपलीं वस्त्रें
धुऊन संध्याकाळपर्यंत अशुचि राहावें; इस्राएल लोक
व त्यांच्यामध्यें राहणारे परदेशीय यांच्यासंबंधानें हा
निरंतरचा विधि होय. ११ एकाद्या मनुष्याच्या प्रेताला
कोणी शिवला तर त्यानें सात दिवस अशुचि राहावें;
१२ असल्या मनुष्यानें तिसरे दिवशीं त्या पाण्यानें
आपलें अशौचक्षालन करावें आणि सातवे दिवशीं
शुद्ध व्हावें; तथापि तिसरे दिवशीं जर त्यानें आपलें
अशौचक्षालन केलें नाहीं तर सातवे दिवशीं तो शुद्ध
होणार नाहीं. १३ कोणी मृत मनुष्याच्या प्रेतास
शिवल्यावर आपलें अशौचक्षालन केलें नाहीं तर तो
परमेश्वराचा निवासमंडप भ्रष्ट करणारा होईल; असल्या
मनुष्याचा इस्राएल लोकांतून उच्छेद व्हावा; अशौच-
क्षालनाचें पाणी त्याजवर शिंपडलें नसल्यामुळें तो
अशुचि होय; त्याच्या ठायीं अशौच अजून तसेंच
राहतें. १४ कोणी मनुष्य डेऱ्यांत मरण पावला असतां
त्याच्यासंबंधानें नियम हा: जो कोणी त्या डेऱ्यांत
आईल किंवा त्यांत राहत असेल त्यानें सात दिवस
अशौच धरावें. १५ तशींच झांकण नसलेलीं उघडीं
पात्रें तेथें असतील तीं सर्व अशुचि समजावीं.
१६ उघड्या मैदानांत तरवारीनें वधलेल्या प्रेतास,
मनुष्याच्या हाडांस अथवा कबरेस कोणी स्पर्श करील
तर त्यानें सात दिवस अशौच धरावें. १७ अशुचि
झालेल्यासाठीं त्या जाळलेल्या पापबलीची कांहीं राख
घेऊन पात्रांत घालावी व तीवर झऱ्याचें पाणी
ओतावें; १८ आणि कोणी शुद्ध असलेल्या मनुष्यानें
एजोबाची जुडी घेऊन पाण्यांत भिजवावी व तें पाणी
त्यानें त्या डेऱ्यावर व त्या डेऱ्यांत असलेलीं सर्व
पात्रें व मनुष्यें यांजवर शिंपडावें; तसेंच ज्यानें हाडास,
वधलेल्यास, मृतास अगर कबरेस स्पर्श केला असेल
त्याजवरहि तें शिंपडावें; १९ शुद्ध असलेल्या पुरुषानें
अशुचि पुरुषावर तिसरे दिवशीं व सातवे दिवशीं तें
शिंपडावें; सातवे दिवशीं त्याला शुद्ध करावें; त्यानें आपलीं
वस्त्रें धुऊन आपलें अंग पाण्यानें धुवावें; तो संध्याकाळीं
शुद्ध होईल. २० तरी कोणी अशुचि झाला असतां
शुद्ध होणार नाहीं तर तो परमेश्वराचें पवित्रस्थान
भ्रष्ट करणारा होय, म्हणून त्याचा मंडळींतून उच्छेद
व्हावा; अशौचक्षालनाचें पाणी त्याजवर शिंपडिलें नाहीं
तर तो अशुचि होय. २१ त्याच्यासंबंधानें हा निरं-
तरचा नियम होय; अशौचक्षालनाचें पाणी जो शिंप-
डील त्यानें आपलीं वस्त्रें धुवावीं, आणि जो त्या
अशौचक्षालनाच्या पाण्यास स्पर्श करील त्यानें संध्या-
काळपर्यंत अशुचि राहावें. २२ ज्या कशाला तो अशुचि
मनुष्य स्पर्श करील तें अशुचि होईल, व जो कोणी
त्या वस्तूस स्पर्श करील त्यानें संध्याकाळपर्यंत
अशुचि राहावें.

२० १ प्रथम मासीं इस्राएल लोकांची सर्व
मंडळी सीन रानांत आली; त्यांनीं कादेश येथें
मुक्काम केला; त्या ठिकाणीं मिर्याम मरण पावली,
व तिला तेथें मूठमाती दिली. २ तेथें मंडळीस पाणी
न मिळाल्यामुळें ते मोशे व अहरोन यांजविरुद्ध जमा
झाले. ३ ते मोशाशीं भांडून म्हणाले, परमेश्वरासमोर
आमचे भाऊबंद मेले तेव्हांच आम्ही मेलों असतों तर
बरें झालें असतें! ४ तुम्हीं परमेश्वराची सर्व मंडळी
येथें कां आणिली? आम्हीं व आमच्या पशूंनीं या
रानांत मरावें म्हणून? ५ मिसर देश सोडावयास
लावून आम्हांस या वाईट ठिकाणीं कां आणिलें? येथें

कांहीं धान्य, अंजीर, द्राक्षवेल अथवा डाळिंबें तर नाहीं-
नच. पण प्यावयाला पाणीसुद्धां नाहीं. ६ तेव्हां मोशे
व अहरोन हे त्या मंडळीसमोरून जाऊन दर्शनमंडपाच्या
दाराशीं उपडे पडले, आणि परमेश्वराचें तेज त्यांच्या
दृष्टीस पडलें. ७ तेव्हां परमेश्वरानें मोशाला सांगितलें,
८ तूं काठी घे आणि तूं व तुझा भाऊ अहरोन मिळून
येथें मंडळी जमा करा व त्यांच्यादेखत तुम्ही त्या
खडकास आज्ञा करा म्हणजे त्यांतून पाणी निघेल;
याप्रमाणें त्यांच्यासाठीं खडकांतून पाणी काढ व या
मंडळीस व त्यांच्या जनावरांस पाज. ९ परमेश्वरानें
आज्ञा दिल्याप्रमाणें मोशानें त्यान्च्यासमोरून ती
काठी आणिली. १० मोशे व अहरोन यांनीं त्या
मंडळीस खडकासमोर जमा केलें, आणि त्यांस
मोशे म्हणाला. अहो बंडखोरांनो, ऐका, तुम्हांसाठीं
आम्हीं या खडकांतून पाणी काढावें काय ? ११ मग
मोशानें हात उचलून त्या खडकावर दोनदा काठी
मारिली, तेव्हां त्यांतून विपुल पाणी वाहूं लागलें,
आणि ती मंडळी व त्यांचीं जनावरें पाणी प्यालीं;
१२ तेव्हां परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस म्हटलें,
तुम्हीं मजवर विश्वास ठेविला नाहीं आणि इस्राएल
लोकांसमक्ष माझी पवित्रता प्रदर्शित केली नाहीं;
म्हणून या मंडळीस जो देश मीं दिला आहे त्या देशीं
यांस न्यावयाचें तुमच्या हातून व्हावयाचें नाहीं. १३ त्या
झऱ्याचें नांव मरीबा ( झगडा ) पडलें, कारण
इस्राएल लोक परमेश्वराशीं त्या ठिकाणीं झगडले, व
त्यांच्यामध्यें त्याचें पावित्र्य प्रगट झालें.

१४ नंतर मोशानें कादेशाहून अदोमाच्या राजाकडे
जासुदांच्या हातीं येणेंप्रमाणें सांगून पाठविलें : तुझा भाऊ
इस्राएल म्हणतो कीं आम्हांवर जे क्लेश ओढवले ते तुला
ठाऊकच आहेत: १५ म्हणजे आमचे पूर्वज मिसर
देशांत गेले होते तेथें आम्ही दीर्घकाळ राहिलों; आणि
मिसरी लोकांनीं आमच्या वडिलांस व आम्हांस दुःख
दिलें; १६ पण आम्हीं परमेश्वराचा धावा केला तेव्हां
त्यानें आमचें ऐकलें आणि दूत पाठवून आम्हांस
मिसर देशांतून बाहेर काढून आणिलें, व हल्लीं आम्ही
तुझ्या सीमेवरील कादेश नगरांत आहों: १७ तर
आम्हांस तुझ्या देशांतून जाऊं दे; आम्ही कोणाच्या
शेतांत किंवा द्राक्षमळ्यांत पाऊल टाकणार नाहीं
किंवा विहिरीचें पाणी पिणार नाहीं; आम्ही नीट राज-
मार्गानें कूच करूं, तुझ्या देशांतून बाहेर पडेपर्यंत
उजवीडावीकडे वळणार नाहीं; १८ पण अदोम त्यास
म्हणाला, माझ्या देशांतून तुला जावयाचें नाहीं, गेलास
तर मी तरवार घेऊन तुझ्याशीं सामना करण्यास
निघेन. १९ इस्राएल लोकांनीं त्यास पुन्हा सांगून
पाठविलें, आम्ही राजमार्गानेंच जाऊं आणि आम्ही
अथवा आमचे पशु तुझें पाणी प्यालों तर त्याचा दाम
मी देईन; मी मोठेंसें कांहीं मागत नाहीं, केवळ तुझ्या
देशांतून मला पायीं जाऊं दे. २० तेव्हां तो म्हणाला,
तुला मी जाऊं देणार नाहीं. मग अदोम मोठें सैन्य
घेऊन बाहुबलानें त्याजशीं सामना करण्यासाठीं बाहेर
पडला. २१ या प्रकारें इस्राएल लोकांस आपल्या
हद्दींतून जाऊं देत नाहीं असें अदोमानें म्हटलें; मग
इस्राएल लोक त्याच्याकडून दुसरीकडे वळले.

२२ इस्राएलाची सर्व मंडळी कादेश येथून कूच
करून होर डोंगरापाशीं येऊन पोहंचली. २३ अदोम
देशाच्या सरहद्दीवर होर डोंगरांत परमेश्वरानें मोशे व
अहरोन यांस सांगितलें कीं २४ अहरोन आतां पितरांस
जाऊन मिळणार; कारण तुम्ही दोघांनीं मरीबाच्या
पाण्यापाशीं माझ्या आज्ञेचें उल्लंघन करून बंड केलें,
म्हणून जो देश मीं इस्राएल लोकांस दिला आहे त्यांत
त्याचा प्रवेश होणार नाहीं. २५ त्याकरितां अहरोन व
त्याचा पुत्र एलाजार यांस घेऊन होर डोंगरावर चल;
२६ आणि अहरोनाचा पोषाक उतरून त्याचा पुत्र
एलाजार यास घाल; मग अहरोन तेथें मरून पितरांस
जाऊन मिळेल. २७ मोशानें परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें
केलें; सर्व मंडळीदेखत ते होर डोंगरावर चढून गेले.
२८ तेथें मोशानें अहरोनाचीं वस्त्रें उतरून त्याचा पुत्र
एलाजार यास घातलीं, आणि अहरोन तेथेंच पर्वत-
शिखरावर मृत्यु पावला; नंतर मोशे आणि एलाजार हे
पर्वतावरून खालीं उतरले. २९ सर्व मंडळीनें अहरोन

मृत्यु पावला हें पाहिलें तेव्हां इस्राएलाच्या घराण्यानें
अहरोनासाठीं तीस दिवस शोक केला.

२१ १ दक्षिण देशीं राहणारा अरादाचा कनानी
राजा यानें ऐकलें कीं हेरांच्या वाटेनें
इस्राएल लोक येत आहेत, तेव्हां त्यानें
त्यांच्याशीं युद्ध करून कित्येकांस कैद केलें. २ तेव्हां
इस्राएलानें परमेश्वरापाशीं असा नवस केला कीं जर
तूं खरोखर हे लोक माझ्या हातीं देशील तर मी
त्यांचा व त्यांच्या नगरांचा निखालस नाश करीन.
३ इस्राएल लोकांचें हें म्हणणें ऐकून परमेश्वरानें
कनानी लोकांस त्यांच्या हातीं दिलें आणि त्यांनीं त्यांचा
व त्यांच्या नगरांचा पूर्णपणें नाश केला; म्हणून त्या
स्थानाचें नांव हर्मा ( नाशनियुक्त ) असें पडलें.

४ मग होर डोंगराजवळून कूच करून अदोम
देशाला वळसा घालून जावें म्हणून त्यांनीं तांबड्या
समुद्राचा मार्ग धरिला; त्या वाटेमुळें लोकांचें मन फार
अधीर झालें. ५ ते परमेश्वराविरुद्ध व मोशाविरुद्ध
बोलूं लागले; ते म्हणाले, तुम्हीं आम्हांस मिसर
देशांतून काढून या जंगलांत मारावयास कां आणिलें?
येथें तर अन्न नाहीं व पाणीहि नाहीं, आणि या
हलक्या अन्नाला आमचा जीव कंटाळला आहे.
६ तेव्हां परमेश्वरानें त्या लोकांत आग्ये साप पाठविले;
त्यांनीं दंश केल्यामुळें इस्राएलांतले बरेच लोक मेले.
७ तेव्हां लोक मोशाकडे येऊन म्हणाले, आम्हीं परमे-
श्वराविरुद्ध व तुझ्याविरुद्ध बोललों हें आम्हीं पाप केलें
आहे; तर हे साप आम्हांपासून दूर करण्याविषयीं
परमेश्वराची प्रार्थना कर. तेव्हां मोशानें लोकांसाठीं
प्रार्थना केली. ८ परमेश्वर मोशाला म्हणाला, आग्या
सापाची एक प्रतिमा करून ध्वजस्तंभाला टांग, म्हणजे
सर्पदंश झालेल्या कोणी माणसानें तिच्याकडे पाहिलें तर
तो जगेल. ९ मग मोशानें पितळेचा एक साप करून
ध्वजस्तंभावर टांगिला, तेव्हां सर्पदंश झालेल्या कोणीं
त्या पितळेच्या सापाकडे पाहिलें म्हणजे तो जगे.
१० नंतर इस्राएल लोकांनीं कूच करून ओबोथ येथें
तळ दिला. ११ ओबोथाहून कूच करून उगवतीस
मवाबासमोरील जंगलांत ईये-अबारीम येथें त्यांनीं
तळ दिला. १२ तेथून कूच करून त्यांनीं जेरेद
खोऱ्यांत तळ दिला. १३ तेथून निघून त्यांनीं जंगलांतून
वाहणारी, अमोऱ्यांच्या देशांतून निघालेली जी आर्णोन
नदी तिच्या पैलतीरीं तळ दिला; ही आर्णोन नदी
मवाबी व अमोरी यांच्या देशांमधून गेली असून
मवाब देशाची सरहद्द आहे. १४ यामुळें परमेश्वराचे
संग्राम नांवाच्या ग्रंथांत येणेंप्रमाणें लिहिलें आहे:

सुफांतला वाहेब,
व आर्णोनेचे ओहोळ,
१५ आणि त्या खोऱ्याची उतरण आर येथील वस्तीपर्यंत,
मवाबाच्या सरहद्दीपर्यंत जाते ती.

१६ तेथून कूच करून ते बैर (विहीर) येथें गेले; ज्या
विहिरीविषयीं परमेश्वरानें मोशाला सांगितलें होतें
कीं लोकांस एकत्र कर म्हणजे मी त्यांस पाणी देईन
तीच ही विहीर.
१७ त्या समयीं इस्राएलानें हें गीत गाइलें:

हे विहिरी, उपळून ये; तुम्ही स्तुतिस्तोत्र गा;
१८ सरदारांनीं ही विहीर खणिली,
इस्राएलांतील अमिरांनीं आपल्या मोठ्यांनीं व
काठ्यांनीं ही खणिली.

मग ते रानांतून मत्तनास गेले; १९ आणि मत्तनाहून
नाहालीयेलास आणि नाहालीयेलाहून बामोथास गेले;
२० आणि बामोथाहून कूच करून मवाबाच्या मैदानां-
तील खोऱ्यापर्यंत आणि रानासमोरील पिसगाच्या
माथ्यावर ते जाऊन पोहंचले.

२१ मग इस्राएलानें अमोऱ्यांचा राजा सीहोन
यास जासुदांच्या हातीं सांगून पाठविलें कीं
२२ आम्हांस तुझ्या देशांतून जाऊं दे, आम्ही बाजूला
वळून कोणत्याहि शेतांत किंवा द्राक्षमळ्यांत पाऊल
टाकणार नाहीं किंवा विहिरींचें पाणी पिणार नाहीं,
आणि तुझ्या देशांतून बाहेर निघेपर्यंत आम्ही केवळ
राजमार्ग धरूं; २३ पण सीहोनानें इस्राएलास आपल्या
देशांतून जाऊं दिलें नाहीं; आपलें सर्व सैन्य जमा

करून इस्राएलाशीं सामना करण्यासाठीं बाहेर निघून
तो रानांत आला; त्यानें यहस येथें येऊन त्याजशीं
लढाई केली. २४ तेव्हां इस्राएलांनीं त्याजवर तरवार
चालविली, आणि आर्णोनेपासून अम्मोन्यांची सरहद्द
यब्बोक नदी येथवर त्यांचा देश काबीज केला; परंतु
अम्मोन्यांची सरहद्द मजबूत होती. २५ याप्रमाणें
इस्राएलांनीं अमोऱ्यांचीं सर्व शहरें घेतलीं व ते
हेशबोनांत व आसपासच्या नगरांत वस्ती करून
राहिले. २६ हेशबोन हें अमोऱ्यांचा राजा सीहोन
याचें नगर होतें; त्यानें मवाबाच्या पूर्वीच्या राजाशीं
लढाई करून आर्णोनेपर्यंतचा त्याचा सर्व देश त्याच्या
हातून हिसकावून घेतला होता. २७ यावरून शाहीर
गातात कीं :

हेशबोनास या;
सीहोनाचें नगर वसवा, त्याची स्थापना करा;
२८ कारण हेशबोनांतून अग्नि निघाला आहे,
सीहोनाच्या नगराहून ज्वाला निघाली आहे :
तिनें मवाबाचें आर, आणि आर्णोनेच्या गढ्यांचे
स्वामी भस्म करून टाकिले आहेत.
२९ हे मवाबा ! तूं हायहाय करणार;
कमोशाचे प्रजे, तूं नष्ट झालीस;
त्यानें आपले पळपुट्ये पुत्र आणि आपल्या कन्या
अमोऱ्यांचा राजा सीहोन याच्या बंदींत पडूं
दिल्या आहेत.
३० आम्हीं त्यांस बाण मारिले आहेत;
दीबोनापर्यंत हेशबोनाचा नाश झाला आहे,
आणि नोफापर्यंत, मेदबापर्यंत सर्व देश आम्हीं
उजाड केला आहे.

३१ याप्रमाणें इस्राएल लोक अमोऱ्यांच्या देशीं
वस्ती करून राहिले. ३२ मग मोशानें याजेर नगराचा
भेद काढण्यासाठीं हेर पाठविले; इस्राएलांनीं त्याच्या
आसपासचे गांव हस्तगत करून तेथल्या अमोऱ्यांस
देशाबाहेर हाकून लाविलें. ३३ नंतर तेथून वळून
ते बाशानाच्या वाटेनें जाऊं लागले, तेव्हां बाशानाचा
राजा ओग यानें त्यांशीं सामना केला, तो आपले सर्व
लोक घेऊन एद्रेई येथें युद्धास उभा राहिला. ३४ तेव्हां
परमेश्वरानें मोशाला सांगितलें, त्यास भिऊं नको, मीं
त्याचे सर्व लोक व त्याचा देश तुझ्या हातीं दिला आहे;
हेशबोनांत राहणारा अमोऱ्यांचा राजा सीहोन यांचें
जसें तूं केलें तसें ह्याचेंहि कर. ३५ त्यांनीं त्यास,
त्याच्या पुत्रांस व सर्व प्रजेस असा मार दिला कीं,
त्याचें कोणीच उरलें नाहीं आणि त्यांनीं त्याचा देश
काबीज केला. १ मग इस्राएल लोकांनीं कूच
२२ करून यरीहोजवळ यार्देनेच्या पूर्वेकडे मवा-
बाच्या मैदानांत डेरे दिले.

२ इस्राएलांनीं अमोऱ्यांचें काय केलें तें सिप्पोराचा
पुत्र बालाक यानें पाहिलें होतें. ३ इस्राएल
लोक बहुत आहेत, हें पाहून मवाब घाबरला;
त्यांच्यामुळें तो फार हवालदिल झाला. ४ तेव्हां
मिद्यानी लोकांच्या वडील जनांस मवाबी म्हणाले,
बैल जसा शेतांतील गवत फस्त करितो तसा हा दळ-
भार आम्हांस चोहोंकडून फस्त करून टाकील. त्या
वेळीं सिप्पोराचा पुत्र बालाक हा मवाबाचा राजा
होता. ५ त्यानें बौराचा पुत्र बलाम जो आपल्या
भाऊबंदांच्या प्रदेशांतील फरात नदीतीरच्या पथोर
नगरांत राहत होता त्यास बोलावण्यास दूत पाठवून
कळविलें कीं पाहा, मिसराहून लोकांचा समुदाय आला
आहे, त्यांनीं भूतल झाकून टाकिलें आहे आणि
माझ्यासमोर मुक्काम केला आहे; ६ म्हणून तूं ये आणि
या लोकांस शाप दे; कारण हे मजहून फार प्रबळ
आहेत; असें तूं केलें तर कदाचित् मी प्रबळ होऊन
त्यांजवर मारा करून त्यांस देशांतून घालवून देण्यास
समर्थ होईन; मला ठाऊक आहे कीं ज्यास तूं
आशीर्वाद देतोस तो आशीर्वादयुक्त होतो व ज्यास तूं
शाप देतोस तो शापग्रस्त होतो. ७ मग मवाबाचे
वडील जन व मिद्यानाचे वडील जन प्रश्न पाहण्याबद्दल
देणगी हातीं घेऊन निघाले; त्यांनीं बलामाकडे जाऊन
त्यास बालाकाचा निरोप सांगितला. ८ तेव्हां तो
त्यांस म्हणाला, आज रात्रीं येथें वस्तीस राहा; परमे-
श्वर मला सांगेल त्याप्रमाणें मी तुम्हांस उत्तर देईन;

तेव्हां मवाबी सरदार बलामाच्या घरीं उतरले.
९ नंतर देव बलामाकडे येऊन त्यास म्हणाला, तुझ्या
येथें आलेले हे पुरुष कोण आहेत ? १० बलामानें
देवास उत्तर दिलें, मवाबाचा राजा, सिप्पोराचा पुत्र
बालाक यानें मला सांगून पाठविलें आहे कीं,
११ पाहा, मिसराहून लोकसमुदाय आला आहे, त्यानें
भूतल झाकून टाकिलें आहे, तर आतां तूं येऊन
माझ्यासाठीं त्यांस शाप दे; तसें तूं केलें तर त्यांशीं
लढून त्यांस मला कदाचित् हाकून देतां येईल.
१२ देव बलामास म्हणाला, तूं यांच्याबरोबर जाऊं
नको; त्या लोकांस शाप देऊं नको; कारण ते
आशीर्वादित लोक आहेत. १३ बलामानें सकाळीं उठून
बालाकाच्या सरदारांस सांगितलें, आपल्या देशीं परत
जा; कारण परमेश्वर मला तुम्हांबरोबर येऊं देत
नाहीं. १४ तेव्हां ते मवाबी सरदार मार्गस्थ होऊन
बालाकाकडे जाऊन म्हणाले कीं बलाम आम्हांबरोबर
येण्यास कबूल होत नाहीं. १५ यानंतर बालाकानें
पुनः पहिल्याहून अधिक प्रतिष्ठित व संख्येनें अधिक
सरदार पाठविले. १६ ते बलामाकडे जाऊन म्हणाले,
सिप्पोराचा पुत्र बालाक असें म्हणतो कीं मजकडे
येण्यास कांहीं अनमान करूं नको; १७ मी खात्रीनें
तुझें फार गौरव करीन, तूं मला सांगशील तें मी करीन;
तर तूं येऊन माझ्यासाठीं या लोकांस शाप दे.
१८ बलामानें बालाकाच्या सेवकांस म्हटलें, बालाकानें
घर भरून सोनेंरुपें मला दिलें तरी परमेश्वर माझा
देव याच्या सांगण्याबाहेर अधिकउणें मला कांहींएक
करितां येत नाहीं. १९ तर आज रात्रीं तुम्ही येथें
राहा म्हणजे परमेश्वर मला आणखी कांहीं सांगतो कीं
काय तें मी पाहीन. २० रात्रीं देव बलामाकडे येऊन
त्याला म्हणाला, हे पुरुष तुला बोलावण्यास आले
असतील तर उठून त्यांच्याबरोबर जा; मात्र मी तुला
सांगेन तेवढें कर. २१ बलाम सकाळीं उठला आणि
आपल्या गाढवीवर खोगीर घालून त्या मवाबी सर-
दारांबरोबर गेला. २२ तो गेल्यामुळें देवाचा कोप
भडकला आणि त्याचा विरोध करण्यासाठीं परमेश्वराचा
दूत मार्गामध्यें आडवा आला. तो गाढवीवर बसला
होता आणि त्याजबरोबर त्याचे दोन सेवक होते.
२३ परमेश्वराचा दूत उपसलेली तरवार हातीं घेऊन
मार्गांत उभा आहे हें त्या गाढवीनें पाहिलें, तेव्हां ती
रस्ता सोडून एका शेतांत शिरली म्हणून तिला पुनः
रस्त्यावर आणण्याकरितां बलामानें मारिलें. २४ मग
द्राक्षमळ्याच्या दोहों बाजूंस आवाराच्या भिंती अस-
लेल्या एका बोळांत परमेश्वराचा दूत उभा राहिला.
२५ परमेश्वराच्या दूतास पाहून ती भिंतीला अशी
लगटली कीं बलामाचा पाय भिंतीशीं चेंगरला, तेव्हां
त्यानें तिला पुनः मारिलें. २६ मग परमेश्वराचा दूत
आणखी पुढें गेला आणि जेथें उजवीडावीकडे वळा-
वयास मुळीं जागा नव्हती अशा संकुचित ठिकाणीं
उभा राहिला. २७ तेथें परमेश्वराच्या दूतास पाहून ती
गाढवी बलामासकट खालीं बसली म्हणून बलामानें
रागास चढून आपल्या काठीनें तिला झोडिलें. २८ तेव्हां
परमेश्वरानें त्या गाढवीला वाचा दिली व ती बलामास
म्हणूं लागली, तूं तीनदा मला मारिलें, मीं तुझें काय
केलें ? २९ बलाम गाढवीस म्हणाला, तूं माझी चेष्टा
केली, माझ्या हातीं तरवार असती तर तुला आतांच
ठार टाकिलें असतें. ३० गाढवी बलामास म्हणाली,
तूं जन्मापासून जिच्यावर बसलास तीच मी तुझी
गाढवी आहें ना ? तुजशीं मी कधीं अशी वागलें
काय ? तो म्हणाला, नाहीं. ३१ तेव्हां परमेश्वरानें
बलामाचे डोळे उघडिले; आणि परमेश्वराचा दूत उपस-
लेली तरवार हातीं घेऊन मार्गांत आडवा आला आहे
हें पाहून त्यानें आपलें मस्तक लववून नमन केलें.
३२ परमेश्वराचा दूत त्यास म्हणाला, तूं तीन वेळां
आपल्या गाढवीस कां मारिलें ? पाहा, मी तुला
आडवा आलों आहें, कारण तुझा मार्ग मला विपरीत
दिसतो; ३३ मला पाहून ती गाढवी माझ्यासमक्ष
तीनदा बाजूस हटली; ती बाजूस झाली नसती तर
खात्रीनें मीं तुला मारून टाकिलें असतें व तिला
जीवंत ठेविलें असतें. ३४ बलाम परमेश्वराच्या दूतास
म्हणाला, मीं पाप केलें आहे; तूं मला अडवावयास

माझ्या मार्गांत उभा आहेस हें मला ठाऊक नव्हतें;
तुला हें वाईट दिसत असेल तर मी आपला परत
जातों. ३५ परमेश्वराच्या दूतानें बलामास सांगितलें, या
मनुष्यांबरोबर जा, पण जें मी तुला सांगेन त्याप्रमाणेंच
कर. मग बलाम बालाकाच्या सरदारांबरोबर गेला.
३६ बलाम आला हें ऐकून बालाक त्याचें स्वागत करण्या-
साठीं आर्णोन नदीतीरीं देशाच्या सीमेवर असलेल्या
एका नगराकडे सामोरा गेला. ३७ बालाक बलामास
म्हणाला, मीं तुला मोठ्या निकडीचें बोलावणें पाठविलें
होतें ना ? मजकडे कां आला नाहींस, तुझें गौरव
करण्याची मला ताकद नाहीं काय ? ३८ बलाम
बालाकास म्हणाला, पाहा, मी तुजकडे आलों आहें;
पण मला स्वतः कांहीं बोलण्याची ताकद आहे काय ?
देव जें वचन माझ्या तोंडीं घालील तेंच मी बोलेन.
३९ मग बलाम बालाकाबरोबर गेला व ते किर्याथ-
हुसोथ येथें आले. ४० तेथें बालाकानें गुरांमेंढरांचे
बलि अर्पिले आणि बलाम व त्याच्याबरोबर जे
सरदार होते त्यांकडे वांटे पाठविले. ४१ सकाळीं
बालाक बलामास बालाच्या उंच स्थानीं घेऊन
गेला; तेथून त्यानें इस्राएल लोकांचा सर्व विस्तार
पाहिला. १ मग बलाम बालाकास म्हणाला,
२३ माझ्यासाठीं येथें सात वेद्या बांध आणि मजसाठीं
सात गोऱ्हे व सात मेंढे तयार ठेव. २ बलामाच्या
सांगण्याप्रमाणें बालाकानें केलें; आणि बालाक व
बलाम यांनीं प्रत्येक वेदीवर एक एक गोऱ्हा व एक
एक मेंढा अर्पिला. ३ तेव्हां बलाम बालाकास म्हणाला, तूं
आपल्या होमबलीपाशीं थांब, मी जरा जातों; कदाचित्
परमेश्वर मला दर्शन देईल; जें कांहीं तो मला कळवील
तें मी तुला सांगेन. असें म्हणून तो एका उघड्या
टेकडीवर गेला. ४ देवानें बलामास दर्शन दिलें तेव्हां
बलाम त्याला म्हणाला, मीं सात वेद्या तयार केल्या
आहेत आणि प्रत्येक वेदीवर एक एक गोऱ्हा व एक
एक मेंढा अर्पिला आहे. ५ तेव्हां परमेश्वरानें बलामाच्या
तोंडीं वचन घालून त्यास म्हटलें, बालाकाकडे परत
जाऊन याप्रमाणें त्याशीं बोल. ६ तो त्याजकडे परत
गेला तेव्हां बालाक सर्व मवाबी सरदारांसह होम-
बलीपाशीं उभा होता. ७ बलाम काव्यरूपानें बोलला:

बालाकानें मला अरामाहून,
मवाबाच्या राजानें मला पूर्वेकडील डोंगरवटीहून
बोलावून आणिलें आहे:
ये, मजप्रीत्यर्थ याकोबास शाप दे,
येऊन इस्राएलास धाक घाल.
८ ज्यास ईश्वरानें शाप दिला नाहीं त्यास मी
शाप कसा देऊं ?
परमेश्वरानें ज्यास धाक घातला नाहीं त्यास मी
धाक कसा घालूं ?
९ खडकांच्या माथ्यावरून ते माझ्या दृष्टीस पडत
आहेत,
टेकड्यांवरून मी त्यांस पाहत आहें;
पाहा, हें राष्ट्र अलग वसणारें आहे,
अन्य राष्ट्रांमध्यें तें मोजावयाचें नाहीं.
१० याकोबाचे रजःकण कोण मोजील ?
इस्राएलाच्या चौथ्या भागाची तरी गणती कोण
करील ?
धार्मिकाप्रमाणें मला मृत्यु प्राप्त होवो;
माझा अंत त्याच्यासारखा होवो !

११ यावर बालाक बलामास म्हणाला, तूं मजशीं
असें हें काय वर्तन केलें ? माझ्या शत्रूंस शाप द्यावा
म्हणून मीं तुला येथें आणिलें आणि तूं तर त्यांस
आशीर्वाद दिला. १२ त्यानें म्हटलें, परमेश्वर जें
कांहीं माझ्या मुखांत घालील तेंच मीं जपून
बोललें पाहिजे ना ? १३ बालाक त्यास म्हणाला,
चल, मजबरोबर दुसऱ्या स्थळीं ये; तेथून ते
तुझ्या दृष्टीस पडतील, पण ते सर्व तुला दिसा-
वयाचे नाहींत, केवळ अगदीं कडेकडेचे दिसतील;
माझ्यासाठीं तेथून त्यांस शाप दे. १४ तो त्यास
पिसगाच्या माथ्यावर सोफिमाचा माळ आहे तेथें
घेऊन गेला; तेथें त्यानें सात वेद्या बांधिल्या व प्रत्येक
वेदीवर एक एक गोऱ्हा व एक एक मेंढा अर्पिला.
१५ मग बलाम बालाकास म्हणाला, तूं तेथें आपल्या

होमबलीपाशीं थांब, मी जरा पलीकडे परमेश्वराचें
दर्शन घेऊन येतों. १६ परमेश्वरानें बलामास दर्शन
दिलें आणि म्हटलें, बालाकाकडे परत जाऊन त्यास
असें बोल, १७ तो त्याजकडे परत गेला तेव्हां
बालाक मवाबी सरदारांसह होमबलीपाशीं उभा होता
आणि बालाकानें त्यास विचारिलें, परमेश्वर काय
बोलला ? १८ तेव्हां त्यानें आपलें कवन आरंभिलें:

वालाका, ऊठ, कान दे;
सिप्पोरपुत्रा, माझें ऐकून घे :

१९ देव कांहीं मनुष्य नाहीं कीं त्यानें लबाडी करावी;
तो कांहीं मानवजात नाहीं कीं त्यानें अनुताप
करावा;
तो बोलला तसें तो करावयाचा नाहीं काय ?
भाक देऊन ती तो पुरी करावयाचा नाहीं काय ?

२० पाहा, आशीर्वाद देण्याची मला आज्ञा
झाली आहे;
त्यानें आशीर्वादच दिला आहे,
तो मला उलटतां येत नाहीं.

२१ त्यानें याकोबांत कांहीं अधर्म पाहिला नाहीं,
इस्राएलांत कांहीं अन्याय पाहिला नाहीं;
त्याचा देव परमेश्वर त्याजबरोबर आहे,
राजाचा जयघोष त्यांच्यामध्यें होत आहे.

२२ देवानें त्यांस मिसर देशांतून बाहेर आणिलें;
गव्याचें बळ त्याचें ठायीं आहे.

२३ याकोबावर कांहीं मंत्रतंत्र मुळींच चालावयाचे
नाहींत;
इस्राएलावर कांहीं चेटक चालावयाचें नाहीं.
योग्य समयीं याकोब व इस्राएल यांविषयीं
असें म्हणतील,
देवानें काय हें अजब केलें !

२४ पाहा, हें राष्ट्र सिंहिणीसारखें उठत आहे,
सिंहाप्रमाणें तें उभें राहत आहे;
शिकार भक्षण करीपर्यंत,
वधलेल्यांचें रुधिर प्राशन करीपर्यंत
तो बसावयाचा नाहीं.

२५ बालाक बलामास म्हणाला, तूं त्यांस शापहि
देऊं नको आणि आशीर्वादहि देऊं नको. २६ तरी
बलाम बालाकास म्हणाला, परमेश्वर सांगेल त्याप्रमाणेंच
मला केलें पाहिजे असें मीं तुला सांगितलें
नव्हतें काय ? २७ मग बालाक बलामास म्हणाला,
आतां चल, मी तुला दुसऱ्या ठिकाणीं नेतों तेथून तूं
माझ्याकरितां त्यांस शाप द्यावे असें कदाचित् देवाच्या
इच्छेस येईल. २८ तेव्हां बालाकानें बलामास राना-
समोरील पौर डोंगराच्या माथ्यावर नेलें. २९ आणि
बलाम बालाकास म्हणाला, येथें मजसाठीं सात
वेद्या बांध आणि सात गोऱ्हे व सात मेंढे तयार
ठेव. ३० बालाकानें बलामाच्या म्हणण्याप्रमाणें केलें;
त्यानें प्रत्येक वेदीवर एक एक गोऱ्हा व एक एक
मेंढा अर्पिला.

२४ १ इस्राएलास आशीर्वाद
देण्याचा परमेश्वराचा मानस आहे असें
बलामानें पाहिलें तेव्हां तो पूर्वीप्रमाणें शकुन
पाहावयास गेला नाहीं, तर त्यानें आपलें तोंड रानाकडे
केलें. २ बलामानें आपले डोळे वर करून पाहिलें
तों इस्राएल लोक आपल्या वंशांप्रमाणें वस्ती करून
आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें; आणि परमे-
श्वराचा आत्मा त्याजवर उतरला. ३ त्यानें आपलें कवन
आरंभिलें तें हें :

बौराचा पुत्र बलाम बोलत आहे,
तो डोळे मिटून बोलत आहे;

४ जो देवाचीं वचनें श्रवण करितो,
जो डोळे उघडून सर्वसमर्थाचें दर्शन पावतो
आणि दंडवत घालितो,
त्याची ही वाणी आहे :

५ हे याकोबा, तुझे डेरे,
हे इस्राएला, तुझीं निवासस्थानें किती रमणीय
आहेत !

६ खोऱ्यांप्रमाणें, नदीतीरींच्या बागांप्रमाणें,
त्यांचा विस्तार आहे :
परमेश्वरानें लाविलेल्या अगरु वृक्षांप्रमाणें,
पाण्याजवळच्या गंधसरूंप्रमाणें तीं आहेत.

७ त्याच्या मोटांतून पाणी वाहील,
त्याच्या बीजाला बहुत जलाचा लाभ घडेल;
त्याचा राजा अगागाहून महान् होईल
व त्याच्या राज्याचा उत्कर्ष होईल.
८ देवानें त्यास मिसरांतून बाहेर आणिलें आहे;
त्याचें बळ गव्याच्या बळासारखें आहे;
विरोध करणाऱ्या राष्ट्रांस तो ग्रासून टाकील,
त्यांचीं हाडें मोडून त्यांचा भुगा करील,
आपल्या बाणांनीं त्यांस विंधील.
९ तो सिंहाप्रमाणें, सिंहिणीप्रमाणें बसला आहे,
त्यानें दबा धरिला आहे,
त्याला कोण छेडील ?
जो कोणी तुझें अभीष्ट चिंतील त्याचें अभीष्ट होईल;
तुला शाप देईल तो शापग्रस्त होईल.
१० तेव्हां बलामावर बालाकाचा क्रोध भडकला; तो
हातावर हात आपटून बलामास म्हणाला, माझ्या
शत्रूंस शाप द्यावा म्हणून मीं तुला बोलावून आणिलें
आणि तूं तर असा तीन वेळां त्यांस आशीर्वादच दिला;
११ तर तूं येथून निघून स्वस्थानीं पळून जा; तुझें
फार गौरव करीन असें मीं म्हटलें होतें, पण आतां
परमेश्वर तुझ्या गौरवाला आडवा आला आहे.
१२ बलाम बालाकास म्हणाला, जे दूत तूं मजकडे
पाठविले होते त्यांस मीं असें सांगितलें नव्हतें काय कीं
१३ बालाकानें आपलें घर भरून सोनेंरुपें मला दिलें
तरी परमेश्वराच्या सांगण्याबाहेर आपल्याच मनानें
मला बरेंवाईट कांहीं करितां येणार नाहीं ? परमेश्वर
सांगेल तेंच मी बोलेन. १४ आतां पाहा, मी
आपल्या लोकांकडे जात आहें, तरी अखेरीस हे
लोक तुझ्या प्रजेचें कायकाय करणार तें तुला सांगून
ठेवितों. १५ मग त्यानें आपलें कवन पुढें चालविलें,
तो म्हणाला :
बौराचा पुत्र बलाम बोलत आहे,
तो डोळे मिटून बोलत आहे;
१६ जो देवाचीं वचनें श्रवण करितो,
जो परात्पराचें ज्ञान जाणतो,
जो डोळे उघडून सर्वसमर्थाचें दर्शन पावतो आणि दंडवत घालतो,
त्याची ही वाणी आहे :
१७ मी त्यास पाहतों पण तो अजून दिसत नाहीं;
त्यास न्याहाळितों पण तो जवळ नाहीं;
याकोबांतून एक तारा उदय पावेल,
आणि इस्राएलांतून एक राजदंड निघेल,
एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत तो मवाबाचा चुराडा करील,
सर्व दंगेखोरांस चीत करील.
१८ त्याचे शत्रु अदोम व सेईर हे त्याच्या ताब्यांत येतील
तोंवर इस्राएल आपला प्रभाव दाखवील.
१९ याकोबांतून एक नियंता निघेल,
तो नगरांतील अवशिष्ट जनांचा विध्वंस करील.
२० मग त्यानें अमालेकास अनुलक्षून आपलें कवन
म्हटलें,
अमालेक राष्ट्रांमध्यें श्रेष्ठ होता;
पण अंतीं त्याचाहि लय होईल.
२१ मग केनी लोकांस अनुलक्षून त्यानें आपलें कवन
पुढें चालविलें :
तुझें वसतिस्थान तर मजबूत आहे,
तुझें घरटें खडकांत आहे.
२२ तरी कोइन उजाड होईल,
व अंतीं अश्शूर तुला बंदिवान करून नेईल.
२३ तो आपलें कवन आणखी पुढें चालवून म्हणाला :
हाय ! हाय ! देव हें घडवून आणील तेव्हां कोणाचा बचाव होईल ?
२४ तरी कित्ती यांच्या किनाऱ्याहून जहाजें येतील
तीं अश्शूरास व एबेरास त्रस्त करितील;
अंतीं त्यांचाहि नाश होईल.
२५ मग बलाम उठून स्वस्थानीं परत गेला आणि
बालाकहि मार्गस्थ झाला.

१ अथवा : केनी

२५ १ इस्राएल लोक शिट्टिमांत राहत असतां
ते मवाबी कन्यांशीं व्यभिचार करूं लागले;
२ त्या स्त्रिया त्यांस आपल्या देवांच्या यज्ञांस
बोलावूं लागल्या; तेथें ते भोजन करून त्यांच्या देवांस
नमन करूं लागले. ३ या प्रकारें इस्राएल लोक बाल-
पौराच्या भजनीं लागले; म्हणून परमेश्वराचा कोप
त्यांजवर भडकला, ४ आणि परमेश्वरानें मोशाला
म्हटलें, लोकांचे सर्व सरदार पकडून मजकरितां उन्हांत
फासावर चढीव म्हणजे माझा भडकलेला कोप
इस्राएलांवरून टळेल. ५ तेव्हां मोशानें इस्राएलांच्या
न्यायाधीशांस सांगितलें, तुमच्या ताब्यांतले जे लोक
बाल-पौराच्या भजनीं लागले आहेत त्या एकुणएकाचा
वध करा. ६ तेव्हां, पाहा, मोशासमोर व दर्शनमंडपाच्या
दाराशीं इस्राएलांची सर्व मंडळी रडत असतां त्यांजसमोर
एका इस्राएली पुरुषानें एका मिद्यानी स्त्रीस आपल्या
भाऊबंदांकडे आणिलें. ७ हें पाहून अहरोन याजकाचा
नातू, एलाजाराचा पुत्र फिनहास यानें मंडळींतून
उठून हातीं बरची घेतली; ८ आणि तो इस्राएल पुरुष
डेऱ्यांत गेल्यावर तोहि त्याच्या पाठोपाठ गेला, आणि
तो पुरुष व ती स्त्री या उभयतांच्या पोटांत त्यानें
बरची भोसकिली. त्या योगें इस्राएलांत मरी पसरली
होती ती थांबली. ९ मरीनें चोवीस हजार मनुष्यें
मृत्यु पावलीं.

१० मग परमेश्वरानें मोशाला म्हटलें, ११ इस्राएल
लोकांपकीं अहरोन याजकाचा नातू एलाजाराचा पुत्र
फिनहास यानें माझ्या ईर्ष्येनें ईर्ष्यायुक्त होऊन
इस्राएल लोकांवरला माझा संताप दूर केला म्हणून मीं
आपल्या ईर्ष्येनें त्यांचा संहार केला नाहीं. १२ यास्तव
त्याला असें सांग कीं मी त्याजशीं माझा शांतीचा करार
करितों; १३ त्याच्याकरितां व त्याच्या मागून त्याच्या
संततीकरितां हा निरंतरच्या याजकत्वाचा करार
होय; कारण आपल्या देवाविषयीं त्याला ईर्ष्या प्राप्त होऊन
त्यानें इस्राएल लोकांसाठीं प्रायश्चित्त केलें. १४ मिद्यानी
स्त्रीबरोबर ज्या इस्राएली पुरुषास ठार मारिलें त्याचें
नांव जिम्री; हा साल्रूचा पुत्र असून शिमोनी वंशांतला
आपल्या पितृकुळाचा सरदार होता. १५ जी
मिद्यानी स्त्री जिवें मारिली तिचें नांव कज़बी; ही
सुराची कन्या होती आणि हा सूर एका मिद्यानी पितृ-
कुळाचा प्रमुख होता.

१६ मग परमेश्वरानें मोशाला सांगितलें,
१७ मिद्यान्यांचा पिच्छा पुरवून त्यांजवर मारा कर;
१८ कारण पौराच्या व कजबीच्या बाबतींत तुम्हांला
भुरळ घालून ते त्रस्त करीत आहेत; कजबी ही
एका मिद्यानी सरदाराची कन्या असून मिद्यान्यांची
जातबहीण होती; पौरामुळें मरी उद्भवली त्या
दिवशीं तिला जिवें मारिलें होतें.

२६ १ मरी येऊन गेल्यावर परमेश्वरानें मोशाला
आणि अहरोन याजकाचा पुत्र एलाजार याला
सांगितलें, २ इस्राएलाच्या मंडळींत जेवढे वीस
वर्षांचे व त्यांहून अधिक वयाचे असून युद्धास लायक
असतील, त्यांच्या पितृकुळांप्रमाणें त्या सर्वांची गणती
कर. ३ त्याप्रमाणें मोशे आणि एलाजार याजक
यांनीं यरीहोपाशीं येऊन यार्देन नदीतीरीं मवाबाच्या
मैदानांत त्यांस सांगितलें कीं ४ मिसर देशांतून मोशे
व इस्राएल लोक आले तेव्हां त्यांस परमेश्वरानें आज्ञा
केली त्याप्रमाणें वीस वर्षांच्या व त्यांहून अधिक
वयाच्या पुरुषांची गणती करा.

५ इस्राएलाचा प्रथम जन्मलेला रऊबेन; त्याचे पुत्र
हनोख व त्याचें हनोखी कुळ, पल्लू याचें पल्लूवी कुळ,
६ हेस्रोन याचें हेस्रोनी कुळ; कर्मी याचें कर्मी कुळ;
७ हीं रऊबेनी कुळें; त्यांची मोजदाद केली ती त्रेचाळीस
हजार सातशें तीस भरली. ८ पल्लूचा पुत्र अलीयाब;
९ अलीयाबाचे पुत्र नमुवेल, दाथान व अबीराम; हे
दाथान व अबीराम मंडळींतले निवडक पुरुष होते;
कोरहाच्या मंडळीनें परमेश्वराशीं विरोध केला तेव्हां यांनीं
त्या मंडळीस सामील होऊन मोशे व अहरोन याशीं
विरोध केला; १० त्या अडीचशें पुरुषांस अग्नीनें भस्म
केलें, त्या समयीं भूमीनें आपलें तोंड उघडून कोरहा-
बरोबर त्यांसहि गिळून टाकिलें, व ते दृष्टांतादाखल
झाले; ११ पण कोरहाच्या पुत्रांचा संहार झाला नाहीं.

१२ ज्यांपासून कुळें निपजलीं ते शिमोनाचे पुत्र हे: नमुवेलाचें नमुवेली कुळ, यामीनाचें यामीनी कुळ, याखीनाचें याखीनी कुळ, १३ जेरहाचें जेरही कुळ, शौलाचें शौली कुळ; १४ हीं शिमोनी कुळें: यांचे बावीस हजार दोनशें लोक भरले.

१५ ज्यांपासून कुळें निपजलीं ते गादाचे पुत्र हे: सफोनाचें सफोनी कुळ, हग्गीचें हग्गी कुळ, शूनीचें शूनी कुळ, १६ आजनीचें आजनी कुळ, एरीचें एरी कुळ, १७ अरोदाचें अरोदी कुळ, अरेलीचें अरेली कुळ; १८ हीं गादी कुळें: यांचे चाळीस हजार पांचशें लोक भरले.

१९ यहूदाचे पुत्र एर व ओनान हे कनान देशांत मरण पावले. २० ज्यांपासून कुळें निपजलीं ते यहूदाचे पुत्र हे: शेलाचें शेलानी कुळ, पेरेसाचें पेरेसी कुळ, जेरहाचें जेरही कुळ. २१ पेरेसाचे वंश हे होते: हेस्रोनाचें हेस्रोनी कुळ, हामूलाचें हामूली कुळ: २२ ही यहूदाची गणती झाली तीप्रमाणें त्याच्या कुळांचे शाहत्तर हजार पांचशें लोक भरले.

२३ ज्यांपासून कुळें निपजलीं ते इस्साखाराचे पुत्र हे: तोलाचें तोलाई कुळ, पुवा याचें पूवी कुळ, २४ याशूबाचें याशूबी कुळ, शिम्रोनाचें शिम्रोनी कुळ: २५ गणती झाली तीप्रमाणें त्याच्या कुळांचे चौसष्ट हजार तीनशें लोक भरले.

२६ ज्यांपासून कुळें निपजलीं ते जबुलूनाचे पुत्र हे: सेरेदाचें सेरेदी कुळ, एलोनाचें एलोनी कुळ, याहलेलाचें याहलेली कुळ: २७ ही जबुलूनाची गणती झाली तीप्रमाणें त्याच्या कुळांचे साठ हजार पांचशें लोक भरले.

२८ ज्यांपासून कुळें निपजलीं ते योसेफाचे पुत्र मनश्शे व एफ्राईम. २९ मनश्शाचे वंशज: माखीराचें माखीरी कुळ, आणि माखीराला गिलाद झाला: गिलादाचें गिलादी कुळ. ३० गिलादाचे पुत्र हे: इयेजेराचें इयेजेरी कुळ, हेलेकाचें हेलेकी कुळ, ३१ अस्रियेलाचें अस्रियेली कुळ, शेखेमाचें शेखेमी कुळ, ३२ शमीदाचें शमीदाई कुळ व हेफेराचें हेफेरी कुळ. ३३ हेफेराचा पुत्र सलाफहाद याला पुत्रसंतान नव्हतें, कन्या मात्र होत्या; आणि सलाफहादाच्या कन्यांचीं नांवें महला, नोआ, हाग्ला, मिल्का व तिरसा. ३४ हीं मनश्शाचीं कुळें, यांचे बावन्न हजार सातशें लोक भरले.

३५ ज्यांपासून कुळें निपजलीं ते एफ्राइमाचे पुत्र हे: शूथेलाहाचें शूथेलाही कुळ, बेकेराचें बेकेरी कुळ, व तहनाचें तहनी कुळ. ३६ शूथेलाहाचे वंशज हे: एरानाचें एरानी कुळ. ३७ ही एफ्राइमाच्या संतानाची गणती झाली तीप्रमाणें त्याच्या कुळांचे बत्तीस हजार पांचशें लोक भरले: हीं सगळीं योसेफाच्या वंशजांचीं कुळें होत.

३८ ज्यांपासून कुळें निपजलीं ते बन्यामिनाचे पुत्र हे: बेलाचें बेलाई कुळ, आशबेलाचें आशबेली कुळ, अहीरामाचें अहीरामी कुळ, ३९ शफूफामाचें शफूफामी कुळ, हूफामाचें हूफामी कुळ. ४० बेलाचे पुत्र आर्द व नामान हे होते: आर्दाचें आर्दी कुळ, नामानाचें नामानी कुळ. ४१ ही बन्यामिनाच्या संतानाची गणती झाली तीप्रमाणें त्याच्या कुळांचे पंचेचाळीस हजार सहाशें लोक भरले.

४२ ज्यांपासून कुळें निपजलीं ते दानाचे पुत्र हे: शूहामाचें शूहामी कुळ. हीं दानाचीं कुळें त्यांच्या कुळांप्रमाणें होत. ४३ ही शूहामाची गणती झाली तीप्रमाणें त्याच्या कुळांचे चौसष्ट हजार चारशें लोक भरले.

४४ ज्यांपासून कुळें निपजलीं ते आशेराचे पुत्र हे: इम्ना याचें इम्नी कुळ; इश्वी याचें इश्वी कुळ; बरीया याचें बरीयी कुळ. ४५ बरीयाच्या वंशांतल्या हेबेराचें हेबेरी कुळ व मल्कीएलाचें मल्कीएली कुळ. ४६ आशेराच्या कन्येचें नांव सेराह होतें. ४७ ही आशेराची गणती झाली तीप्रमाणें त्याच्या कुळांचे त्रेपन्न हजार चारशें लोक भरले.

४८ ज्यांपासून कुळें निपजलीं ते नफतालीचे पुत्र हे: याहसेलाचें याहसेली कुळ, गूनीचें गूनी कुळ, ४९ येसेराचें येसेरी कुळ व शिल्लेमाचें शिल्लेमी कुळ.

५० ही नफतालीची गणती झाली तीप्रमाणें त्याच्या कुळांचे पंचेचाळीस हजार चारशें लोक भरले.

५१ इस्राएलांची गणती झाली ती सहा लक्ष एक हजार सातशें तीस भरली.

५२ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, ५३ यांच्या संख्येप्रमाणें या देशाचें वतन यांच्यामध्यें वांटून द्याव-याचें आहे. ५४ अधिक संख्येच्या लोकांस अधिक वांटा द्यावा व कमी संख्येच्या लोकांस कमी वांटा द्यावा; प्रत्येक कुळांस त्याच्या त्याच्या टिपलेल्या संख्ये-प्रमाणें वतन द्यावें; ५५ पण चिठ्या टाकून जमीन वांटण्यांत यावी; त्यांच्या पितृकुळांतील प्रत्येक घराण्याच्या नांवाप्रमाणें त्यांना वांटा मिळावा. ५६ ते संख्येनें बहुत असोत कीं थोडे असोत, त्यांची वतनें चिठ्या टाकून वांटावीं.

५७ लेव्यांच्या घराण्यांतील ज्यांची मोजदाद कुळां-प्रमाणें केली ते हे: गेर्षोनाचें गेर्षोनी कुळ, कहाथाचें कहाथी कुळ व मरारीचें मरारी कुळ. ५८ लेव्यांचीं कुळें हीं: लिब्नी कुळ, हेब्रोनी कुळ, महली कुळ, मूशी कुळ व कोरही कुळ; आणि कहाथास अम्राम झाला. ५९ अम्रामाच्या स्त्रीचें नांव योखबेद, ही मिसरांत जन्मलेली लेव्याची कन्या; अम्रामाला तिज-पासून अहरोन व मोशे आणि त्यांची बहीण मिर्याम हीं अपत्यें झालीं. ६० अहरोनास नादाब, अबीहू, एलाजार व इथामार हे झाले. ६१ नादाब व अबीहू यांनीं परमेश्वरासमोर अशास्त्रोक्त अग्नि पेटविला तेव्हां ते ठार झाले. ६२ लेव्यांपैकीं एका महिन्याच्या व वरच्या वयाच्या पुरुषांची गणती केली ते तेवीस हजार भरले; इस्राएल लोकांबरोबर लेव्यांची गणती केली नाहीं याचें कारण हेंच कीं त्यांस इस्राएल लोकांबरोबर वतन दिलें नव्हतें.

६३ मोशे व एलाजार याजक यांनीं मवाबाच्या मैदानांत यरीहोपाशीं यार्देन नदीतीरीं इस्राएल लोकांची गणती केली ती एवढी भरली; ६४ पण सीनाय रानांत मोशानें व अहरोन याजकानें इस्राएल लोकांची गणती केली होती त्यांपैकीं या प्रसंगीं एकहि पुरुष या नव्या गणनेंत नव्हता. ६५ कारण परमेश्वरानें त्यांच्या-विषयीं सांगितलें होतें कीं ते रानांत अवश्य मृत्यु पावतील. यफुन्नेचा पुत्र कालेब आणि नूनाचा पुत्र यहोशवा यांच्याखेरीज त्यांच्यांतला एकहि पुरुष उरला नाहीं.

२७ १ मग योसेफाचा पुत्र मनश्शे याच्या वंशां-तला सलाफहाद बिन हेफेर बिन गिलाद बिन माखीर याच्या कन्या पुढें आल्या; त्यांचीं नांवें महला, नोआ, हाग्ला, मिल्का व तिरसा हीं होतीं. २ मोशे, एलाजार याजक, सरदार व सर्व मंडळी यांजसमोर दर्शनमंडपाच्या दारापाशीं त्या उभ्या राहून म्हणाल्या, ३ आमचा पिता रानांत मृत्यु पावला, आणि ज्या मंडळीनें कोरहाच्या मंडळीस सामील होऊन परमेश्वराचा विरोध केला त्यांत तो नव्हता तर आपल्याच पापावस्थेंत तो मेला; त्याला कांहीं पुत्रसंतान नव्हतें. ४ तर पुत्रसंतान नाहीं एवढ्यानें आमच्या पित्याचें नांव कुळांतून कां बुडावें? आम्हांलाहि आमच्या पित्याच्या आप्तांबरोबर वतन द्या. ५ मोशानें त्यांचें हें प्रकरण परमेश्वरापुढें ठेविलें. ६ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, ७ सलाफहादाच्या कन्या बोलतात तें बरोबर आहे; त्यांच्या पित्याच्या भाऊबंदांबरोबर तूं त्यांस अवश्य दायभाग द्यावा; त्यांच्या बापाचें वतन त्यांच्या नांवें कर. ८ तूं इस्राएल लोकांस असें सांग, कोणी मनुष्य निपुत्रिक मेला तर त्याचें वतन त्याच्या कन्येस द्यावें. ९ त्याला कन्या नसली तर त्याचें वतन त्याच्या भावांस द्यावें. १० त्याचे कोणी भाऊ नसले तर त्याचें वतन त्याच्या चुलतभावंडांस द्यावें. ११ त्याला कोणी चुलतभावंडें नसलीं तर त्याच्या कुळापैकीं जो जवळचा नातलग असेल त्याला तें वतन द्यावें, म्हणजे तो तें भोगील; परमेश्वरानें मोशाला आज्ञा दिली त्या-प्रमाणें इस्राएलसंबंधानें हाच निर्णय समजावा.

१२ मग परमेश्वरानें मोशाला सांगितलें, तूं या अबारीम पर्वतावर चढून जा व तेथून जो देश मीं इस्राएल लोकांस दिला आहे तो पाहा. १३ तूं तो पाहिल्यावर तुझा भाऊ अहरोन याच्याप्रमाणें पितरांस

जाऊन मिळशील; १४ कारण सीन रानांत मंडळीचें भांडण झालें त्या समयीं त्या झऱ्यापाशीं त्यांच्यासमोर माझें पावित्र्य प्रदर्शित करावें अशी जी माझी आज्ञा तीविरुद्ध तुम्ही गेलां. ( हा सीन रानांतील कादेश येथील मरीबा नामक झरा. ) १५ मोशानें परमेश्वरास सांगितलें, १६ अखिल प्राणिमात्रांचा जो देव त्यानें या मंडळीवर एका पुरुषाची नेमणूक करावी; १७ तो त्यांच्यापुढें येजा करील आणि त्यांच्या येण्याजाण्यासंबंधानें त्यांचा नेता होईल; अशानें परमेश्वराची मंडळी मेंढपाळ नसलेल्या शेरडांमेंढरांप्रमाणें असावयाची नाहीं. १८ तेव्हां परमेश्वर मोशाला म्हणाला, तूं नूनाचा पुत्र यहोशवा यास आणून त्याजवर हात ठेव; त्याच्या ठायीं माझा आत्मा वसत आहे. १९ एलाजार याजक व सर्व मंडळी यांच्यासमोर त्यास उभें करून त्यांच्यादेखत त्याला अधिकारारूढ कर. २० आपली कांहीं मानमर्यादा त्याला दे; म्हणजे इस्राएलाची मंडळी त्याचें मानील. २१ तो एलाजार याजकापुढें उभा राहील आणि त्याच्या वतीनें एलाजार उरीमाच्या द्वारें परमेश्वराला प्रश्न विचारील; त्याच्या हुकमानें तो सर्व इस्राएल मंडळीसह येजा करील. २२ परमेश्वराच्या ह्या आज्ञेप्रमाणें मोशानें केलें; त्यानें यहोशवास आणून एलाजार याजक व सर्व मंडळी यांच्यासमोर उभें केलें; २३ आणि परमेश्वरानें मोशाच्या द्वारें सांगितलें होतें त्याप्रमाणें त्यानें त्याजवर हात ठेवून त्यास अधिकारारूढ केलें.

## २८

१ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, २ इस्राएल लोकांस आज्ञा कर कीं, मला सुवासिक वाटेल असें हव्यरूप भोजन तुम्ही मजप्रीत्यर्थ नियमित समयीं अर्पिण्याचें स्मरण ठेवा. ३ आणखी तूं त्यांस सांग, परमेश्वराप्रीत्यर्थ जें हव्य तुम्हीं अर्पावें तें हें: नित्य होमार्पणासाठीं रोज एक एक वर्षाचीं दोन निर्दोष कोकरें अर्पावीं. ४ एक कोकरूं सकाळीं व दुसरें सायंकाळीं; ५ आणि कुटून काढिलेल्या एक चतुर्थांश हिन तेलांत मळलेल्या एक दशमांश एफा सपिठाचें अन्नार्पण करावें. ६ हा नित्याचा होमबलि परमेश्वराला सुवासिक हव्य व्हावा असें सीनाय पर्वतावर विहित केलें होतें. ७ त्याबरोबरचें पेयार्पण एका कोकरामागें एक चतुर्थांश हिन असावें, म्हणजे परमेश्वरासाठीं तूं पवित्रस्थानीं मदिरेचें पेयार्पण ओतावें. ८ दुसरें कोकरूं सायंकाळीं अर्पावें; सकाळचें अन्नार्पण व त्याबरोबरचें पेयार्पण यांप्रमाणें परमेश्वरास सुवासिक हव्य म्हणून अर्पावें.

९ दर शब्बाथ दिवशीं एक एक वर्षाचीं दोन निर्दोष कोकरें आणि अन्नार्पणासाठीं तेलांत मळलेलें दोन दशमांश सपीठ व त्याबरोबरचें पेयार्पण हीं अर्पावीं; १० नित्य होमार्पण व त्याबरोबरचें पेयार्पण यांशिवाय आणखी हा होमबलि प्रति शब्बाथदिनीं अर्पावा.

११ प्रत्येक महिन्याच्या प्रतिपदेस परमेश्वराप्रीत्यर्थ होमार्पण करावें; दोन गोऱ्हे, एक मेंढा आणि सात एक एक वर्षाचीं निर्दोष कोकरें अर्पावीं; १२ प्रत्येक गोऱ्ह्यामागें तेलांत मळलेलें तीन दशमांश एफा सपीठ आणि प्रत्येक मेंढ्यामागें तेलांत मळलेलें दोन दशमांश एफा सपीठ, १३ आणि प्रत्येक कोकरामागें तेलांत मळलेलें एक दशमांश एफा सपीठ एवढें सर्व अन्नार्पण द्यावें; हा सुवासिक होमबलि परमेश्वराप्रीत्यर्थ हव्य होईल. १४ त्याबरोबरचीं पेयार्पणें हीं असावीं; गोऱ्ह्यामागें अर्धा हिन, मेंढ्यामागें एक तृतीयांश हिन आणि कोकरामागें एक चतुर्थांश हिन द्राक्षारस; वर्षांतील प्रत्येक महिन्यांत होमबलि अर्पावयाचा तो हा. १५ आणखी परमेश्वराप्रीत्यर्थ पापार्पण म्हणून एक बकरा द्यावा; नित्य होमार्पण व त्याबरोबरचें पेयार्पण यांशिवाय आणखी तो अर्पावा.

१६ पहिल्या महिन्याच्या चतुर्दशीस परमेश्वराचा वल्हांडण सण पाळावा. १७ तसाच या महिन्याच्या पंधराव्या दिवशींहि सण पाळावा; सात दिवस बेखमीर भाकर खावी. १८ पहिल्या दिवशीं पवित्र मेळा भरवावा व त्या दिवशीं कांहींएक अंगमेहनतीचें काम करूं नये. १९ या दिवशीं तुम्हीं परमेश्वराप्रीत्यर्थ एक हव्य

म्हणजे होमार्पण करावें; दोन गोऱ्हे, एक मेंढा व
एक एक वर्षाचीं सात कोकरें अर्पावीं; हीं सर्व निर्दोष
असावीं; २० त्यांबरोबरचें अन्नार्पण म्हणजे तेलांत
मळलेलें सपीठ असावें; गोऱ्ह्यामागें तीन दशमांश
एफा आणि मेंढ्यामागें दोन दशमांश एफा सपीठ
अर्पावें; २१ आणि सात कोकरांपैकीं प्रत्येक कोकरा-
मागें एक दशमांश एफा सपीठ अर्पावें; २२ तुम्हां-
साठीं प्रायश्चित्त व्हावें म्हणून पापार्पणासाठीं एक
बकराहि अर्पावा. २३ सकाळच्या जो नित्य होम
विहित केला आहे त्याखेरीज हीं अर्पावीं. २४ या
प्रकारें सात दिवसपर्यंत दररोज तुम्हीं हव्यरूप भोजन
अर्पावें; हें परमेश्वराला सुवासिक वाटेल; नित्य होमार्पण
व त्याबरोबरचें पेयार्पण यांशिवाय आणखी हें अर्पावें.
२५ सातव्या दिवशीं तुम्हीं पवित्र मेळा भरवावा
आणि त्या दिवशीं तुम्हीं कांहींएक अंगमेहनतीचें काम
करूं नये.

२६ सप्तकांच्या सणांत प्रथम फळें अर्पिण्याच्या
दिवशीं तुम्ही परमेश्वराला नव्या अन्नाचें अर्पण कराल
तेव्हांहि तुम्हीं पवित्र मेळा भरवावा; त्या दिवशीं
कांहींएक अंगमेहनतीचें काम करूं नये; २७ परमेश्वराला
सुवासिक हव्य व्हावें म्हणून एक होमार्पण करावें;
दोन गोऱ्हे, एक मेंढा व एक एक वर्षाचीं सात
कोकरें; २८ आणि त्याबरोबरचें अन्नार्पण तेलांत
मळलेल्या सपिठाचें असावें, म्हणजे गोऱ्ह्यामागें तीन
दशमांश एफा व मेंढ्यामागें दोन दशमांश एफा,
२९ आणि त्या सात कोकरांपैकीं प्रत्येक कोकरामागें
एक दशमांश एफा सपीठ अर्पावें; ३० तुम्हांसाठीं
प्रायश्चित्त व्हावें म्हणून एक बकरा अर्पावा. ३१ हीं
सर्व निर्दोष असावीं; आणि नित्य होमार्पण व
त्याबरोबरचें अन्नार्पण यांखेरीज हीं अर्पावीं व
त्यांबरोबरचीं पेयार्पणें अर्पावीं.

२९ १ मग सातव्या महिन्याच्या प्रतिपदेस
पवित्र मेळा भरवावा; त्या दिवशीं अंगमेहनतीचें
कांहीं काम करूं नये; हा तुमचा कर्णे
वाजविण्याचा दिवस होय. २ परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक
हव्य म्हणजे अर्थात् एक गोऱ्हा, एक मेंढा आणि
एक एक वर्षाचीं सात निर्दोष कोकरें हीं अर्पावीं;
३ त्यांबरोबरचें अन्नार्पण तेलांत मळलेल्या सपिठाचें
असावें; गोऱ्ह्यामागें तीन दशमांश, मेंढ्यामागें दोन
दशमांश, ४ आणि सात कोकरांतल्या एक एक
कोकरामागें एक दशमांश एफा सपीठ अर्पावें,
५ आणि तुम्हांप्रीत्यर्थ प्रायश्चित्त व्हावें यासाठीं पापार्पण
म्हणून एक बकरा अर्पावा; ६ मासारंभींचें होमार्पण
आणि त्याबरोबरचें अन्नार्पण, तसेंच नित्य होमार्पण
व त्याबरोबरचें अन्नार्पण व त्यांबरोबरचीं पेयार्पणें
या सर्वांखेरीज हें अर्पण परमेश्वराला सुवासिक हव्य
म्हणून विधिपूर्वक अर्पावें.

७ या सातव्या महिन्याच्या दशमीस तुम्हीं पवित्र
मेळा भरवावा; त्या दिवशीं तुम्हीं आपल्या जिवास क्लेश
होऊं द्यावा व कांहींएक काम करूं नये; ८ आणि परमे-
श्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य अर्पण करावें तें येणेंप्रमाणें:
एक गोऱ्हा, एक मेंढा, एक एक वर्षाचीं सात कोकरें
अर्पावीं; हीं सर्व निर्दोष असावीं; ९ आणि त्यांबरोबर
तेलानें मळलेल्या सपिठाचा अन्नबलि असावा; म्हणजे
गोऱ्ह्यामागें तीन दशमांश एफा, मेंढ्यामागें दोन
दशमांश एफा, १० आणि सात कोकरांतल्या प्रत्येक
कोकरामागें एक दशमांश एफा याप्रमाणें सपीठ
अर्पावें; ११ प्रायश्चित्ताचें पापार्पण, नित्य होमार्पण व
त्याबरोबर त्याचें अन्नार्पण आणि त्या सर्वांबरोबरचीं
पेयार्पणें यांखेरीज पापार्पणाचा एक बकरा अर्पावा.

१२ सातव्या महिन्याच्या पंधराव्या दिवशीं तुम्हीं
पवित्र मेळा भरवावा; त्या दिवशीं कांहीं अंगमेहनतीचें
काम करूं नये, आणि परमेश्वराप्रीत्यर्थ सात दिवस
सण पाळावा; १३ परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य
म्हणून होमार्पण करावें तें हें: तेरा गोऱ्हे, दोन मेंढे
आणि एक एक वर्षाचीं चौदा कोकरें; हीं सर्व निर्दोष
असावीं; १४ त्यांबरोबर तेलानें मळलेल्या सपिठाचा
अन्नबलि असावा, म्हणजे तेरा गोऱ्ह्यांतील एक एक
गोऱ्ह्यामागें तीन दशमांश, दोन मेंढ्यांपैकीं प्रत्येक
मेंढ्यामागें दोन दशमांश, १५ आणि चौदा कोकरां-

तल्या एकेका कोकरामागें एक दशमांश सपीठ
अर्पावें; १६ आणि पापार्पण म्हणून एक बकरा अर्पावा;
नित्य होमार्पण व त्याबरोबरचें अन्नार्पण व पेयार्पण
यांखेरीज हें अर्पण करावें.
१७ दुसरे दिवशीं बारा गोऱ्हे, दोन मेंढे आणि
एक एक वर्षाचीं निर्दोष चौदा कोकरें अर्पावीं;
१८ आणि त्यांबरोबर गोऱ्ह्यांसाठीं, मेंढ्यांसाठीं व
कोकरांसाठीं त्यांच्या संख्येप्रमाणें अन्नार्पण व पेयार्पणें
विधिपूर्वक करावीं; १९ आणि नित्य होमार्पण व
त्याबरोबरचें अन्नार्पण व त्याबरोबरचीं पेयार्पणें
यांखेरीज पापार्पण म्हणून एक बकरा अर्पावा.
२० तिसरे दिवशीं अकरा गोऱ्हे, दोन मेंढे, एक
एक वर्षाचीं निर्दोष चौदा कोकरें अर्पावीं, २१ आणि
त्यांबरोबर गोऱ्ह्यांसाठीं, मेंढ्यांसाठीं व कोकरांसाठीं
त्यांच्या संख्येप्रमाणें विधिपूर्वक अन्नार्पण व पेयार्पणें
करावीं; २२ आणि पापार्पण म्हणून एक बकरा
अर्पावा; नित्य होमार्पण व त्याबरोबरचें अन्नार्पण व
पेयार्पण यांखेरीज हें अर्पण करावें.
२३ चौथे दिवशीं दहा गोऱ्हे, दोन मेंढे, एक एक
वर्षाचीं निर्दोष चौदा कोकरें अर्पावीं; २४ त्यांबरोबर
गोऱ्ह्यांसाठीं, मेंढ्यांसाठीं व कोकरांसाठीं त्यांच्या
संख्येप्रमाणें विधिपूर्वक अन्नार्पण व पेयार्पणें करावीं,
२५ नित्य होमार्पण आणि त्याबरोबरचें अन्नार्पण व
पेयार्पण यांखेरीज पापार्पण म्हणून एक बकरा अर्पावा.
२६ पांचवे दिवशीं नऊ गोऱ्हे, दोन मेंढे, एक एक
वर्षाचीं चौदा निर्दोष कोकरें अर्पावीं; २७ त्यांबरोबर
गोऱ्ह्यांसाठीं, कोकरांसाठीं व मेंढ्यांसाठीं त्यांच्या
संख्येप्रमाणें विधिपूर्वक अन्नार्पण व पेयार्पणें करावीं;
२८ आणि नित्य होमार्पण व त्याबरोबरचें अन्नार्पण व
पेयार्पण यांखेरीज पापार्पण म्हणून एक बकरा अर्पावा.
२९ सहावे दिवशीं आठ गोऱ्हे, दोन मेंढे, एक
एक वर्षाचीं चौदा निर्दोष कोकरें अर्पावीं; ३० आणि
त्यांबरोबर गोऱ्ह्यांसाठीं, मेंढ्यांसाठीं व कोकरांसाठीं
त्यांच्या संख्येप्रमाणें विधिपूर्वक अन्नार्पण व पेयार्पणें
करावीं; ३१ नित्य होमार्पण व त्यांबरोबरचें अन्नार्पण व
पेयार्पणें यांखेरीज पापार्पण म्हणून एक बकरा अर्पावा.
३२ सातवे दिवशीं सात गोऱ्हे, दोन मेंढे, आणि
एक एक वर्षाचीं चौदा निर्दोष कोकरें अर्पावीं; ३३ आणि
त्यांबरोबर गोऱ्ह्यांसाठीं, मेंढ्यांसाठीं व कोकरांसाठीं
त्यांच्या संख्येप्रमाणें विधिपूर्वक अन्नार्पण व पेयार्पणें
करावीं; ३४ नित्य होमार्पण व त्यांबरोबरचें अन्नार्पण व
पेयार्पणें यांखेरीज पापार्पण म्हणून एक बकरा अर्पावा.
३५ आठवे दिवशीं तुम्हीं पवित्र मेळा भरवावा;
या दिवशीं कांहीं अंगमेहनतीचें काम करूं नये;
३६ परमेश्वराप्रीत्यर्थ सुवासिक हव्य म्हणून होमार्पण
करावें तें असें: एक गोऱ्हा, एक मेंढा, व एक एक
वर्षाचीं सात निर्दोष कोकरें; ३७ आणि त्यांबरोबर
गोऱ्ह्यांसाठीं, मेंढ्यांसाठीं व कोकरांसाठीं त्यांच्या
संख्येप्रमाणें विधिपूर्वक अन्नार्पण व पेयार्पणें करावीं;
३८ नित्य होमार्पण व त्याबरोबरचें अन्नार्पण व पेयार्पण
यांखेरीज पापार्पण म्हणून एक बकरा अर्पावा.
३९ तुमचे नवस व स्वसंतोषानें केलेलीं अर्पणें
यांखेरीज आणखी नेमलेल्या सणांत हे होमबलि,
अन्नार्पणें, पेयार्पणें आणि शांत्यर्पणें परमेश्वराला
अर्पावीं. ४० परमेश्वरानें मोशाला आज्ञा केली होती
त्याप्रमाणें सर्व कांहीं त्यानें इस्राएल लोकांस कळविलें.

## ३०

१ मग मोशानें इस्राएल लोकांच्या वंशांच्या
प्रमुखांस म्हटलें कीं परमेश्वरानें आज्ञा दिली
ती ही: २ कोणा पुरुषानें परमेश्वराला नवस
केला अथवा आपण व्रतबद्ध व्हावें म्हणून शपथ
वाहिली तर त्यानें आपल्या वचनाचा भंग करूं नये;
जें कांहीं त्याच्या तोंडून निघालें असेल त्याप्रमाणें त्यानें
करावें. ३ त्याप्रमाणेंच कोणी स्त्री कौमार्यावस्थेंत आपल्या
पित्याच्या घरीं असतां परमेश्वराला नवस करून व्रतबद्ध
झाली असली, ४ आणि तिचा नवस आणि ज्या वचनानें
ती व्रतबद्ध झाली तें वचन ऐकून तिचा पिता कांहीं
बोलला नसला तर तिचे सर्व नवस कायम राहतील,
आणि ज्या बंधनांनीं तिनें आपणास बद्ध केलें असेल
तीहि कायम राहतील; ५ पण तें ऐकून तिचा पिता
तिला मना करील तर तिचे नवस किंवा ज्या कोणत्याहि

बंधनानें तिनें आपणास बद्ध केलें असेल त्यांपैकीं कोणतेंहि कायम राहावयाचें नाहीं; तिच्या पित्यानें तिला मनाई केली आहे म्हणून परमेश्वर तिला क्षमा करील. ६ तिनें नवस केल्यावर किंवा ती अविचारानें व्रतबद्ध झाल्यावर ती पतीची झाली, ७ आणि तें ऐकून तिचा पति कांहीं बोलला नाहीं तर तिचे नवस कायम राहतील आणि ज्या बंधनांनीं तिनें स्वतांस बद्ध केलें असेल तींहि कायम राहतील; ८ पण तिच्या पतीनें तें ऐकलें त्या दिवशींच तिला मना केलें तर तिनें केलेले नवस आणि तिनें अविचारानें ज्या वचनांनीं आपणास बद्ध केलें असेल तीं वचनें रद्द होतील; परमेश्वर त्या स्त्रीचें पाप क्षमा करील. ९ विधवेनें किंवा सूटपत्र मिळालेल्या स्त्रीनें कांहीं नवस केला तर तिनें आपल्या ज्या वचनांनीं आपणास बद्ध केलें असेल तीं कायम राहतील. १० कोणी स्त्री आपल्या पतीच्या घरीं राहून नवस करील अथवा शपथेनें आपणास बांधून घेईल, ११ व तिचा पति तें ऐकून कांहीं बोलणार नाहीं व तिला मना करणार नाहीं, तर तिचे सर्व नवस कायम राहतील, व ज्या बंधनांनीं तिनें आपणास बद्ध केलें असेल तीं बंधनेंहि कायम राहतील; १२ पण नवऱ्यानें तीं ऐकलीं त्याच दिवशीं तीं रद्द केलीं तर तिच्या तोंडून जे नवस अथवा तिला बद्ध करणारीं वचनें निघालीं असतील तीं रद्द होतील; तिच्या नवऱ्यानें तीं रद्द केल्यामुळें परमेश्वर तिला क्षमा करील. १३ तिचा कोणताहि नवस आणि जिवास क्लेश देणारें कोणतेंहि व्रत तिचा पति वाटल्यास कायम करील किंवा रद्द करील. १४ एकेक दिवस लोटत असतां तिचा पति तिला कांहीं बोलला नाहीं तर तो तिचे सर्व नवस आणि ज्या ज्या बंधनांनीं तिनें आपणास बद्ध केलें असेल तीं तो कायम करितो; तीं ऐकलीं त्याच दिवशीं तो कांहीं बोलला नाहीं, यावरून त्यानें तीं कायम केलीं आहेत असें समजावें; १५ पण त्यानें ऐकल्यानंतर पुढें तीं रद्द केलीं तर त्याच्या स्त्रीचा अधर्म त्याच्या माथीं. १६ पतिपत्नीसंबंधाच्या आणि पिता व त्याच्या घरीं असणारी त्याची कुमारी कन्या यासंबंधाच्या ज्या विधींविषयीं परमेश्वरानें मोशाला आज्ञा दिली ते हे होत.

**३१** १ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, २ इस्राएल लोकांबद्दल मिद्यान्यांचें उसनें फेड; त्यानंतर तूं पितरांस जाऊन मिळशील. ३ मोशे लोकांस म्हणाला, युद्धासाठीं तुमच्यांतल्या पुरुषांस सज्ज करा म्हणजे ते मिद्यानावर चढाई करून परमेश्वरासाठीं मिद्यानाचा सूड घेतील. ४ इस्राएलाच्या सर्व वंशांतून प्रत्येक वंशामागें एक एक हजार लोक युद्धास पाठवा. ५ या प्रकारें इस्राएलाच्या सहस्रावधि लोकांतून प्रत्येक वंशामागें एक एक हजार पुरुष सादर केले; म्हणजे बारा हजार पुरुषांनीं युद्धासाठीं शस्त्रें धारण केलीं. ६ मोशानें एका एका वंशांतले हजार पुरुष घेऊन एलाजार याजकाचा पुत्र फिनहास यास त्यांच्याबरोबर लढाईस पाठविलें आणि पवित्रस्थानांतलीं पात्रें आणि इषारा देण्यासाठीं रणशिंगें त्यांच्या हातीं दिलीं. ७ परमेश्वरानें मोशाला आज्ञा केल्याप्रमाणें त्यांनीं मिद्यानाशीं लढून सर्व पुरुषांची कत्तल केली. ८ इतर योद्ध्यांखेरीज त्यांनीं अवी, रेकेम, सूर, हूर व रेबा या नांवांच्या मिद्यानाच्या पांच राजांचा वध केला; बौराचा पुत्र बलाम यालाहि तरवारीनें वधिलें; ९ आणि इस्राएल लोकांनीं मिद्यानाच्या स्त्रिया व मुलेंबाळें यांस पाडाव केलें आणि त्यांचे गाईबैल, शेरडेंमेंढरें व सर्व मालमत्ता लुटिली; १० आणि त्यांच्या वस्तीचीं सर्व नगरें व छावण्या त्यांनीं जाळून टाकिल्या. ११ मग सर्व पाडाव केलेले मनुष्य व पशु आणि सारी लूट त्यांनीं घेतली. १२ यरीहोपाशीं यार्देनतीरीं मवाबाच्या मैदानांतील छावणींत मोशे, एलाजार याजक आणि इस्राएल लोकांची मंडळी होती तेथें त्यांनीं ते बंदिवान, धरिलेले पशु व लूट हीं आणिलीं.

१३ तेव्हां मोशे, एलाजार याजक आणि मंडळीचे सर्व सरदार त्यांस छावणीबाहेर सामोरे गेले. १४ जे सहस्रपति, शतपति इत्यादि सेनापति युद्धाहून परत आले होते त्यांजवर मोशे फार कोपला. १५ तो त्यांस म्हणाला, तुम्ही सर्व स्त्रिया वांचविल्या काय? १६ पाहा,

बलामाच्या मसलतीवरून पौराच्या प्रकरणीं इस्राएल
लोकांकडून परमेश्वराशीं फितुरी करविण्यास त्या स्त्रिया
कारण झाल्या, आणि त्यामुळें परमेश्वराच्या मंडळींत मरी
पसरली. १७ तर आतां मुलांबाळांपैकीं हरएक मुलग्यास
व जिनें पुरुषाशीं समागम केला आहे अशा प्रत्येक
स्त्रीस मारून टाका. १८ जितक्या मुलींनीं पुरुषाशीं
समागम केलेला नाहीं त्या सर्व आपणांसाठीं जिवंत राखून
ठेवा. १९ तुम्ही सर्व सात दिवस छावणीच्या बाहेर
राहा, व तुम्हांपैकीं ज्यानें कोणास जिवें मारिलें असेल
आणि वधिलेल्यांचा ज्यांस स्पर्श झाला असेल त्या
सर्वांनीं आपल्या बंदिवानांसह तिसऱ्या व सातव्या
दिवशीं स्वतांला शुद्ध करावें. २० सर्व वस्त्रें, चामड्याच्या
सर्व वस्तु, बकऱ्याच्या केसांच्या व लाकडाच्या सर्व
वस्तु यांच्या विटाळापासून आपणांला शुद्ध करा.
२१ मग एलाजार याजकानें युद्धास गेलेल्या सर्व
सैनिकांस सांगितलें कीं परमेश्वरानें मोशाला आज्ञा-
पिलेल्या नियमशास्त्राचा विधि हा होय. २२ सोनें,
चांदी, पितळ, लोखंड, कथील, शिसें वगैरे २३ जें
कांहीं अग्नींत टिकण्याजोगें असेल तें अग्नींत टाकून
काढिलें म्हणजे शुद्ध होईल, तरी पण तें अशौच-
क्षालनाच्या जलानें शुद्ध करावें; जें कांहीं अग्नींत
टिकण्याजोगें नसेल तें पाण्यांत घालून काढावें.
२४ सातव्या दिवशीं तुम्हीं आपलीं वस्त्रें धुवावीं आणि
शुद्ध होऊन छावणींत यावें.

२५ परमेश्वरानें मोशाला सांगितलें, २६ एलाजार
याजक आणि मंडळींतील निरनिराळ्या पितृकुळांचे
मुख्य यांस बरोबर घेऊन मनुष्य आणि पशु यांची जी
लूट आणिली तिची यादी कर; २७ त्यांनीं त्या लुटीचे
दोन भाग करावे, युद्धास गेलेल्या योद्ध्यांस अर्धा भाग
व इतर सर्व मंडळीस अर्धा भाग द्यावा; २८ युद्धास
गेलेल्या योद्ध्यांच्या हिश्शांतून मनुष्यें, गाईबैल, गाढवें,
शेरडेंमेंढरें यांपैकीं पांचशांमागें एक अशीं परमेश्वरा-
प्रीत्यर्थ करभार म्हणून घे; २९ त्यांच्या अर्ध्या हिश्शां-
तून तो घेऊन परमेश्वराप्रीत्यर्थ समर्पित अंश म्हणून
एलाजार याजकास दे. ३० मग इस्राएल लोकांस
मिळालेल्या अर्ध्या हिश्शांतून मनुष्यें, गाईबैल, गाढवें,
शेरडेंमेंढरें आदिकरून सर्व पशु यांपैकीं पन्नासांमागें
एक घेऊन परमेश्वराच्या निवासमंडपाचे रक्षक जे लेवी
त्यांस दे. ३१ परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें मोशे आणि
एलाजार याजक यांनीं केलें. ३२ सैन्यांतील शिपायांनीं
ज्या वस्तु लुटून घेतल्या त्यांखेरीज सहा लक्ष पंचाहत्तर
हजार शेरडेंमेंढरें, ३३ बहात्तर हजार गाईबैल,
३४ एकसष्ट हजार गाढवें, ३५ आणि मनुष्यांपैकीं
ज्यांनीं पुरुष पाहिला नव्हता अशा बत्तीस हजार स्त्रिया
एवढी ती लूट होती. ३६ युद्धास गेले होते त्यांच्या
वांट्यास या लुटीचा अर्धा हिस्सा आला त्यांत तीन
लक्ष सदतीस हजार पांचशें शेरडेंमेंढरें होतीं;
३७ त्यांपैकीं परमेश्वराचा करभार म्हणून सहाशें
पंचाहत्तर होतीं. ३८ गाईबैल छत्तीस हजार असून
त्यांपैकीं परमेश्वराचा करभार म्हणून बहात्तर होते.
३९ गाढवें तीस हजार पांचशें असून त्यांपैकीं परमे-
श्वराचा करभार म्हणून एकसष्ट होतीं. ४० मनुष्यें
सोळा हजार असून त्यांपकीं परमेश्वराचा करभार
म्हणून बत्तीस होतीं. ४१ परमेश्वराप्रीत्यर्थ समर्पित
अंश म्हणून जो करभार तो परमेश्वरानें आज्ञा केल्या-
प्रमाणें मोशानें एलाजार याजकास दिला. ४२ युद्ध
करणाऱ्यांखेरीज इतर इस्राएल लोकांचा अर्धा
हिस्सा मोशानें काढिला होता तो येणेंप्रमाणें:
४३ तीन लक्ष सदतीस हजार पांचशें शेरडेंमेंढरें,
४४ छत्तीस हजार गाईबैल, ४५ तीस हजार
पांचशें गाढवें, ४६ आणि सोळा हजार मनुष्यें;
४७ योद्ध्यांच्या हिश्शांपासून वेगळा करून मोशानें इतर
मंडळीसाठीं ठेविला होता त्या अर्ध्या हिश्शापैकीं मोशानें
मनुष्य व पशु पन्नासांमागें एक घेऊन परमेश्वराच्या
निवासमंडपाचे रक्षक जे लेवी त्यांस दिले. ४८ मग
इस्राएलाच्या सहस्रावधि लोकांवर असलेले सेनापति
म्हणजे सहस्रपति, शतपति वगैरे मोशाकडे येऊन
म्हणाले, ४९ जे सैनिक आमच्या स्वाधीन होते त्यांची
तुझ्या दासांनीं गणना केली, त्यांपैकीं कोणी
एकहि कमी झाला नाहीं; ५० म्हणून आम्हां प्रत्येकास

जे सोन्याचे दागिने मिळाले, म्हणजे अर्थात् तोडे, कड़ीं
आंगठ्या, कुंडलें व बाजूबंद हीं सर्व आम्हीं आमच्या
जीवांसाठीं परमेश्वराला प्रायश्चित्त म्हणून अर्पण
करावयास आणिलीं आहेत. ५१ तेव्हां मोशे व
एलाजार यांनीं त्यांजपासून तें सोनें व सर्व जडावाचे
दागिने घेतले. ५२ सहस्रपति व शतपति यांनीं जें
सोनें परमेश्वराला अर्पण केलें तें सर्व सोळा हजार
सातशें पन्नास शेकेल भरलें. ५३ या योद्ध्यांनीं आप-
आपल्यासाठीं ही लूट मिळविली होती. ५४ मोशे व
एलाजार याजक यांनीं हें सोनें सहस्रपति व शतपति
यांजकडून घेऊन इस्राएल लोकांप्रीत्यर्थ परमेश्वरासमोर
स्मारक व्हावें म्हणून दर्शनमंडपांत पोंचतें केलें.

**३२** १ रऊबेन व गाद वंशांतल्या लोकांजवळ
गुरेंढोरें विपुल होतीं; म्हणून त्यांनीं याजेर व
गिलाद हे प्रांत पाहिले तेव्हां ते गुरांढोरांसाठीं
चांगले आहेत असे दिसले; २ गाद व रऊबेन
वंशांतले लोक मोशे, एलाजार याजक आणि मंडळीचे
सरदार यांजपाशीं जाऊन म्हणाले, ३ अटारोथ,
दीबोन, याजेर, निम्रा, हेशबोन, एलाले, सबाम, नबो
व बौन ४ यांचा जो प्रदेश परमेश्वरानें इस्राएल
लोकांकडून पादाक्रांत करविला तो गुरांढोरांसाठीं
चांगला आहे आणि तुझ्या दासांजवळ गुरेंढोरें आहेत.
५ ते म्हणाले, तुझी कृपादृष्टि तुझ्या दासांवर असली
तर हा प्रदेश तुझ्या दासांस वतन करून दे; आम्हांस
यार्देनेपलीकडे नेऊं नको. ६ गाद व रऊबेन यांच्या
वंशजांस मोशे म्हणाला, तुमचे भाऊबंद युद्धास
जातील तेव्हां तुम्ही येथें बसून राहणार काय ?
७ त्याप्रमाणेंच जो देश परमेश्वरानें इस्राएल लोकांस दिला
आहे तेथें उतरून जाण्यासंबंधानें तुम्ही त्यांचें मन
निराश• कां करितां ? ८ तुमच्या वडिलांस मीं जेव्हां
कादेश-बर्ण्याहून तो देश पाहावयास पाठविलें होतें
तेव्हां त्यांनींहि तसेंच केलें. ९ त्यांनीं जेव्हां अष्कोल
ओहळापर्यंत जाऊन देश पाहिला तेव्हां परमेश्वरानें
जो देश इस्राएल लोकांस दिला होता त्यांत जाऊं नये
असें त्यांच्या मनांत भरविलें. १० त्याच दिवशीं परमे-
श्वराचा क्रोध भडकला आणि त्यानें शपथ वाहिली
कीं ११ मिसर देशांतून निघालेल्या लोकांपैकीं वीस
वर्षांचे व त्यांहून अधिक वयाचे जे आहेत त्यांच्या
दृष्टीस, अब्राहाम, इसहाक व याकोब यांस जो देश मीं
देण्याविषयीं शपथ वाहिली तो पडावयाचाच नाहीं,
कारण ते मला पूर्णपणें अनुसरले नाहींत; १२ मात्र
यफुन्नेचा पुत्र कनिज्जी कालेब आणि नूनाचा पुत्र
यहोशवा हे तो देश पाहतील, कारण ते परमेश्वराला
पूर्णपणें अनुसरले आहेत. १३ ह्यामुळें परमेश्वराचा
कोप इस्राएलावर भडकला आणि ज्यांनीं परमेश्वराच्या
दृष्टीनें दुष्कर्म केलें त्यांची सर्व पिढी खपून जाईपर्यंत
त्यानें त्यांस चाळीस वर्षें रानांत सैरावैरा भटकावयास
लाविलें. १४ आतां पाहा, परमेश्वराचा इस्राएलावर
क्रोध अधिक भडकावा म्हणून तुम्ही आपल्या
वडिलांच्या जागीं त्यांची पातकी संतति उठलां आहां.
१५ तुम्ही त्यास सोडून बहकलां तर तो त्यांस
आणखीहि रानांतच सोडून देईल आणि तुम्ही या सर्व
लोकांचा सत्यनाश कराल. १६ तेव्हां ते मोशाजवळ
जाऊन म्हणाले, आम्ही आपल्या गुरांढोरांसाठीं येथें
वाडगीं बांधूं आणि आपल्या मुलांबाळांसाठीं नगरें
वसवूं; १७ तरी आम्ही इस्राएल लोकांस स्वस्थानीं
नेऊन पोंचवीपर्यंत हत्यारबंद होऊन त्यांच्या अघाडीस
चालूं; पण आमचीं मुलेंबाळें या देशांतील लोकांच्या
भीतीमुळें तटबंदी नगरांत राहतील. १८ इस्राएल
लोक आपआपल्या वतनांवर कायम होतील तोंवर
आम्ही घरीं परत येणार नाहीं. १९ आम्ही त्यांजबरोबर
यार्देनेपलीकडे व त्याच्याहि पुढें आपलें वतन करणार
नाहीं; कारण यार्देनेच्या अलीकडे उगवतीस
आमचा हिस्सा आम्हांस मिळाला आहे. २० तेव्हां
मोशानें त्यांस म्हटलें, तर मग असें करा : तुम्ही युद्ध
करावयासाठीं परमेश्वराच्या पुढें हत्यारबंद व्हा;
२१ आणि परमेश्वर आपल्या शत्रूंस आपल्यासमोरून
हाकून देईपर्यंत यार्देनेपलीकडे तुमच्या सर्व हत्यारबंद
मनुष्यांनीं परमेश्वराच्या पुढें चालावें. २२ देश

परमेश्वराच्या स्वाधीन झाल्यानंतर तुम्ही परत या व
तशानें परमेश्वराच्या व इस्राएल लोकांच्या संबंधानें
तुम्ही निर्दोष ठराल आणि हा देश परमेश्वराच्या दृष्टीनें
तुमचें वतन होईल. २३ तुम्ही असें न कराल तर
पाहा, तुम्ही परमेश्वराचे अपराधी व्हाल, आणि हें पक्कें
लक्षांत ठेवा कीं तुमचें पाप तुम्हांस भोवेल. २४ तर
तुम्ही आपल्या मुलांबाळांसाठीं नगरें वसवा आणि
आपल्या शेरडांमेंढरांसाठीं वाडगीं करा आणि तुमच्या
तोंडून जें निघालें आहे त्याप्रमाणें तुम्ही करा.
२५ तेव्हां गादी व रऊबेनी मोशाला म्हणाले, प्रभूच्या
आज्ञेप्रमाणें तुझे दास करितील. २६ आमचीं मुलेंबाळें,
स्त्रिया, शेरडेंमेंढरें, गुरेंढोरें गिलादांतील नगरांत
राहतील; २७ पण स्वामीच्या सांगण्याप्रमाणें तुझे सर्व
दास युद्धासाठीं हत्यारबंद होऊन परमेश्वराच्या पुढें
युद्ध करावयास पलीकडे जातील.

२८ तेव्हां मोशानें त्यांच्यासंबंधानें एलजार याजक,
नूनाचा पुत्र यहोशवा आणि इस्राएल लोकांच्या
पितृकुळांतील प्रमुख पुरुष यांस आज्ञा केली कीं,
२९ गादी व रऊबेनी लोक युद्धासाठीं हत्यारबंद होऊन
तुम्हांबरोबर यार्देनेपलीकडे परमेश्वराच्या पुढें जातील
व तो देश तुमच्या ताब्यांत येईल तेव्हां तुम्ही
गिलाद देश त्यांस वतन करून द्या; ३० पण हे
तुम्हांबरोबर हत्यारबंद होऊन पलीकडे न गेले तर
कनान देशांत त्यांस तुमच्याबरोबर वतन मिळावें.
३१ तेव्हां गादी व रऊबेनी म्हणाले, परमेश्वरानें
आम्हां तुझ्या दासांस सांगितलें तसें आम्ही करूं.
३२ आम्ही हत्यारबंद होऊन परमेश्वराच्या पुढें
पलीकडे कनान देशांत जाऊं, पण आमचें वतन
यार्देनेच्या पूर्वेस व्हावें. ३३ मग मोशानें गादी,
रऊबेनी आणि योसेफाचा पुत्र मनश्शे याचा अर्धा
वंश यांस अमोऱ्यांचा राजा सीहोन आणि बाशानाचा
राजा ओग या दोघांच्या राज्यांतील देश, नगरें व
त्यांच्या आजूबाजूची भूमि दिली. ३४ मग गाद्यांनीं
दीबोन, अटारोथ, अरोएर, ३५ अटारोथ-शोफान,
याजेर, यागबहा, ३६ बेथ-निम्रा आणि बेथ-हारान हीं
नगरें तटबंदी केलीं; आणि शेरडांमेंढरांसाठीं वाडगीं
केलीं. ३७ रऊबेन्यांनीं हेशबोन, एलाले, किर्याथाईम,
३८ आणि मूळचीं नांवें बदलून नबो, बाल-मौन व
सिब्मा हीं नगरें वसविलीं; आणि त्यांनीं वसविलेल्या
इतर नगरांस निरनिराळीं नांवें दिलीं. ३९ मनश्शाचा
पुत्र माखीर याच्या वंशजांनीं जाऊन गिलाद प्रांत
घेतला आणि तेथें अमोरी लोक राहत होते त्यांस
घालवून दिलें. ४० तेव्हां मोशानें मनश्शाचा पुत्र
माखीर याच्या वंशजांस गिलाद प्रांत दिला, व ते तेथें
राहूं लागले. ४१ आणि मनश्शाचा पुत्र याईर यानें
जाऊन गिलादांतील अनेक नगरें घेतलीं आणि त्यांस
हव्वोथ-याईर हें नांव दिलें. ४२ नोबह यानें जाऊन
कनाथ व त्यांच्या आसपासचीं खेडीं घेतलीं आणि
त्यांस नोबह हें आपलें नांव ठेविलें.

३३ १ मोशे व अहरोन यांच्या नायकत्वाखालीं
इस्राएल लोकांच्या ज्या सेना मिसर देशांतून
बाहेर निघाल्या त्यांच्या मजला येणेंप्रमाणें:
२ परमेश्वराच्या आज्ञेवरून त्यांनीं कूच केलें त्या-
प्रमाणें त्यांच्या मजला मोशानें नोंदिल्या त्या ह्या:
३ पहिल्या महिन्याच्या पंधराव्या दिवशीं त्यांनीं
रामसेस येथून कूच केलें; वल्हांडणाच्या दुसरे दिवशीं
इस्राएल लोक सर्व मिसरी लोकांदेखत बेधडक बाहेर
निघाले; ४ त्या प्रसंगीं मिसरी लोक परमेश्वरानें ठार
केलेल्या आपल्या ज्येष्ठ पुत्रांस मूठमाती देत होते;
आणि परमेश्वरानें त्यांच्या देवांसहि शासन केलें.
५ इस्राएल लोकांनीं रामसेस येथून कूच करून सुक्कोथ
येथें डेरे दिले. ६ सुक्कोथाहून कूच करून रानाच्या
सीमेवरल्या एथामांत त्यांनीं डेरे दिले. ७ एथामाहून
कूच करून बाल-सफोनासमोरलें पी-हहीरोथ यास
वळसा घालून मिग्दोलासमोर त्यांनीं डेरे दिले.
८ मग ते पी-हहीरोथापासून कूच करून समुद्र
ओलांडून रानांत गेले आणि एथाम रानांत तीन
मजला करून मारा येथें त्यांनीं डेरे दिले. ९ माराहून
कूच करून ते एलिमास गेले; एलीम येथें पाण्याचे

बारा झरे आणि सत्तर खजुरीचीं झाडें होतीं तेथें
त्यांनीं डेरे दिले. १० एलिमाहून निघून त्यांनीं
तांबड्या समुद्राच्या किनाऱ्यावर डेरे दिले.
११ तांबड्या समुद्रापासून निघून सीन रानांत त्यांनीं
डेरे दिले. १२ सीन रानांतून कूच करून त्यांनीं
दफका येथें डेरे दिले. १३ दफका येथून त्यांनीं कूच
करून आलूश येथें डेरे दिले. १४ आलूशाहून कूच
करून त्यांनीं रफीदिमांत डेरे दिले; तेथें लोकांस पाणी
प्यावयास मिळालें नाहीं. १५ रफीदिमाहून कूच
करून त्यांनीं सीनाय रानांत डेरे दिले. १६ सीनाय
रानांतून कूच करून त्यांनीं किब्रोथ-हत्तव्वा येथें डेरे
दिले. १७ किब्रोथ-हत्तव्वा येथून कूच करून हसेरोथ
येथें त्यांनीं डेरे दिले. १८ हसेरोथ येथून निघून
रिथमा येथें त्यांनीं डेरे दिले. १९ रिथमा येथून कूच
करून त्यांनीं रिम्मोन-पेरेस येथें डेरे दिले.
२० रिम्मोन-पेरेसांतून कूच करून त्यांनीं लिब्ना येथें
डेरे दिले. २१ लिब्ना येथून कूच करून त्यांनीं रिस्सा
येथें डेरे दिले. २२ रिस्सा येथून कूच करून त्यांनीं
कहेलाथा येथें डेरे दिले. २३ कहेलाथाहून कूच करून
त्यांनीं शेफेर डोंगराजवळ डेरे दिले. २४ शेफेर
डोंगराजवळून कूच करून त्यांनीं हरादांत डेरे दिले.
२५ हरादाहून कूच करून त्यांनीं मकहेलोथांत डेरे
दिले. २६ मकहेलोथाहून कूच करून तहथांत त्यांनीं
डेरे दिले. २७ तहथाहून कूच करून तारहांत
त्यांनीं डेरे दिले. २८ तारहाहून कूच करून मिथकांत
त्यांनीं डेरे दिले. २९ मिथकाहून कूच करून हशमोनांत
त्यांनीं डेरे दिले. ३० हशमोनाहून कूच करून मोसे-
रोथांत त्यांनीं डेरे दिले. ३१ मोसेरोथाहून कूच करून
बनेयाकानांत त्यांनीं डेरे दिले. ३२ बनेयाकानाहून
कूच करून होर-हागिदगादांत त्यांनीं डेरे दिले.
३३ होर-हागिदगादाहून कूच करून याटबाथांत त्यांनीं
डेरे दिले. ३४ याटबाथाहून कूच करून अब्रोनांत
त्यांनीं डेरे दिले. ३५ अब्रोनाहून कूच करून एस-
योन-गेबेरांत त्यांनीं डेरे दिले. ३६ एसयोन-गेबेरांतून
कूच करून सीन रान म्हणजे कादेश यांत त्यांनीं डेरे
दिले. ३७ कादेशाहून कूच करून अदोम देशाच्या
सीमेवरील होर पर्वताजवळ त्यांनीं डेरे दिले. ३८ इस्रा-
एल लोक मिसर देशांतून निघाल्यावर चाळिसाव्या
वर्षी पांचव्या महिन्याच्या प्रतिपदेस या ठिकाणीं
अहरोन याजक परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें होर पर्वतावर
चढला व तेथें मृत्यु पावला. ३९ अहरोन होर पर्वता-
वर मृत्यु पावला तेव्हां एकशें तेवीस वर्षांचा होता.
४० अरादाचा कनानी राजा जो कनान देशाच्या
दक्षिणेस राहत होता त्यानें इस्राएल लोक आल्याची
बातमी ऐकली. ४१ होर पर्वताकडून कूच करून
त्यांनीं सलमोनांत डेरे दिले. ४२ सलमोनाहून कूच
करून पूनोनांत त्यांनीं डेरे दिले. ४३ पूनोनाहून कूच
करून त्यांनीं ओबोथांत डेरे दिले. ४४ ओबोथाहून
कूच करून मवाबाच्या सीमेवरल्या ईये-अबारीमांत
त्यांनीं डेरे दिले. ४५ मग ईयीमाहून कूच करून
गादाच्या दीबोनांत त्यांनीं डेरे दिले. ४६ गादाच्या
दीबोनाहून कूच करून दिबलाथाईमाच्या अलमोनांत
त्यांनीं डेरे दिले. ४७ दिबलाथाईमाच्या अलमोनाहून
कूच करून अबारीम डोंगरामध्यें नबोसमोर त्यांनीं डेरे
दिले. ४८ अबारीम डोंगराहून कूच करून मवाबाच्या
अरण्यांत यरीहोजवळ यार्देनतीरीं त्यांनीं डेरे दिले.
४९ मवाबाच्या अरण्यांत यार्देनतीरीं बेथ-यशिमोथा-
पासून आबेल-शिट्टिमापर्यंत त्यांनीं डेरे दिले.

५० मवाबाच्या मैदानांत यरीहोपाशीं यार्देन नदी-
तीरीं परमेश्वर मोशेला म्हणाला, ५१ इस्राएल लोकांस
सांग कीं तुम्ही यार्देन ओलांडून कनान देशांत पोहंचाल
५२ तेव्हां त्या देशच्या सर्व रहिवाश्यांस घालवून द्या;
त्यांच्या पाषाणमूर्ति व ओतींव मूर्ति यांचा विध्वंस करा
व त्यांचीं उच्चस्थानें मोडून टाका; ५३ तुम्ही तो देश
ताब्यांत घेऊन त्यांत वस्ती करा; कारण तुम्हीं त्या
देशाचें वतनदार व्हावें म्हणून मीं तो देश तुम्हांस दिला
आहे. ५४ तुम्ही तो देश चिठ्या टाकून आपआपल्या
कुळांप्रमाणें वांटून घ्या; जीं कुळें मोठीं असतील त्यांस
मोठा भाग द्या आणि जीं लहान असतील त्यांस
लहान भाग द्या; ज्या ठिकाणाविषयीं कोणा माणसाच्या

नांवाची चिठी निघेल तें त्याचें वतन होईल; आप-
आपल्या वडिलांच्या कुळांप्रमाणें तुम्हांस वतन मिळावें;
५५ पण तुम्हीं त्या देशच्या रहिवाश्यांस घालवून
दिलें नाहीं तर जे लोक तुम्ही तेथें राहूं द्याल
ते तुमच्या डोळ्यांत कुसळांसारखें व तुमच्या कुशीला
काट्यांसारखे रुततील, आणि त्या देशांत तुम्ही वस्ती
कराल तेथें तेथें ते तुम्हांस त्रास देतील. ५६ तसें
झाल्यास मीं जसें त्यांचें करावयाचें योजिलें आहे
तसेंच तुमचें करीन.

३४ १ परमेश्वर मोशाला म्हणाला, २ इस्राएल
लोकांस आज्ञा कर कीं कनान देश सर्व चतुः-
सीमांप्रमाणें तुमचें वतन व्हावयाचा आहे;
तुम्ही कनान देशांत पोहंचाल ३ तेव्हां तुमचा दक्षिण-
प्रांत सीन नांवाच्या रानापासून अदोम देशाच्या सर-
हद्दीपर्यंत असावा, आणि तुमची दक्षिण सीमा क्षार-
समुद्राच्या वरच्या टोकाशीं सुरू होऊन पूर्वेपर्यंत
असावी; ४ तेथून तुमची सरहद्द अक्राब्बीम नामक
चढावाच्या दक्षिणेस पोंचून वळसा घेऊन सीनापर्यंत
न्यावी, आणि ती तशीच कादेश-बर्ण्याच्या दक्षिणेस
निघावी, आणि हसर-अद्दारापर्यंत जाऊन असमोनास
पोंचावी; ५ मग ती सरहद्द असमोनापासून वळसा
घेऊन मिसरच्या नाल्यापर्यंत पोंचावी, आणि
तेथून थेट सागरतीरापर्यंत जावी. ६ तुमची पश्चिम
सीमा महासमुद्र व त्याच्या लगत्याचा प्रदेश होय;
तीच तुमची पश्चिम सीमा. ७ तुमची उत्तर सीमा
महासमुद्रापासून होर पर्वतापर्यंत रेखावी; ८ आणि
होर पर्वतापासून हमाताच्या घाटापर्यंत रेखून ती
सदादापर्यंत जावी. ९ मग ती सीमा जिफ्रोनास पोंचून
तिचा शेवट हसर-एनान येथें व्हावा; हीच तुमची उत्तर
सीमा. १० तुमची पूर्व सीमा हसर-एनान येथून शफामा-
पर्यंत रेखावी; ११ व तिची सरहद्द शफामाहून
अईनच्या पूर्वेस रिब्ला आहे तेथपर्यंत उतरत उतरत
किन्नेरेथ समुद्राच्या पूर्वतीरास लागावी. १२ मग ती
सीमा यार्देनेपर्यंत उतरून खालीं थेट क्षारसमुद्रापर्यंत
जावी; तुमच्या देशाच्या चतुःसीमा त्याच होत.
१३ तेव्हां मोशानें इस्राएल लोकांस आज्ञा केली कीं
चिठ्या टाकून ज्या देशाचें तुम्ही वतन पावणार आहां
आणि परमेश्वरानें साडेनऊ वंशांस जो देश देण्याची
आज्ञा दिली आहे तो हाच: १४ रऊबेनी, गादी व
मनश्शाचा अर्धा वंश यांस त्यांच्या पितृकुळाप्रमाणें
भाग मिळून चुकला आहे; १५ अडीच वंशांस यरीहो-
पाशीं यार्देनेच्या अलीकडे पूर्व दिशेस म्हणजे उगवतीस
त्यांचें वतन मिळून चुकलें आहे.
१६ परमेश्वरानें मोशाला सांगितलें कीं, १७ जे पुरुष
हा देश तुम्हांस वांटून देतील त्यांचीं नांवें हीं: एलाजार
याजक व नूनाचा पुत्र यहोशवा. १८ देशाची वांटणी
करण्यासाठीं एकेका वंशाचा एकेक सरदार घ्यावा.
१९ त्या पुरुषांचीं नांवें हीं: यहूदा वंशांतला यफुन्नेचा
पुत्र कालेब; २० शिमोनाच्या वंशांतला आम्मीहूदाचा
पुत्र शमुवेल; २१ बन्यामिनाच्या वंशांतला किसलो-
नाचा पुत्र अलीदाद; २२ दानी वंशांतला सरदार
यागलीचा पुत्र बुक्की; २३ योसेफाच्या संतती-
पैकीं मनश्शे वंशांतला सरदार एफोदाचा पुत्र हन्नी-
एल; २४ एफ्राइमी वंशांतला सरदार शिफटा-
नाचा पुत्र कमुवेल; २५ जबुलूनी वंशांतला सरदार
पार्नाकाचा पुत्र अलीसाफान; २६ इस्साखारी वंशांतला
सरदार अज्जानाचा पुत्र पालटीयेल; २७ आशेरी
वंशांतला सरदार शलोमीचा पुत्र अहीहूद; २८ आणि
नफताली वंशांतला सरदार आम्मीहूदाचा पुत्र पदाहेल;
२९ परमेश्वरानें कनान देश इस्राएल लोकांस वांटून
देण्याची आज्ञा ज्या पुरुषांस केली ते हे.

३५ १ आणखी परमेश्वर मवाबाच्या मैदानांत
यरीहोपाशीं यार्देनतीरीं मोशाला म्हणाला,
२ इस्राएल लोकांस अशी आज्ञा कर कीं तुम्हीं
आपल्या ताब्यांतील वतनांतून लेव्यांस राहण्यासाठीं
नगरें द्यावीं, आणि त्या नगरांच्या आसपासचीं
शिवारेंहि त्यांस द्यावीं. ३ नगरें त्यांच्या वस्तीसाठीं
आणि आसपासचीं शिवारें गाईबैल व शेरडेंमेंढरें

वगैरे त्यांच्या जनावरांसाठीं असावीं. ४ लेव्यांस जीं
शिवारें द्याल तीं नगराच्या तटाबाहेर हजार हात
सभोवार असावीं. ५ आणि नगराच्या बाहेर पूर्व
बाजूस दोन हजार हात, दक्षिण बाजूस दोन हजार
हात, पश्चिम बाजूस दोन हजार हात आणि उत्तर
बाजूस दोन हजार हात जमीन मापावी; आणि नगर
मध्यवर्ती असावें. ६ लेव्यांस जीं नगरें तुम्ही द्याल
त्यांपैकीं सहा शरणपुरें असावीं; मनुष्यवध करणाऱ्यांस
पळून जावयासाठीं तीं असावीं; त्यांखेरीज आणखी
बेचाळीस नगरें लेव्यांस द्यावीं. ७ अशीं एकंदर
अठ्ठेचाळीस नगरें व त्यांचीं शिवारें लेव्यांस द्यावीं.
८ इस्राएल लोकांच्या वतनांतून जीं नगरें लेव्यांस
द्यावयाचीं तीं मोठ्या वतनांतून अधिक व थोड्या
वतनांतून कमी अशीं द्यावीं; प्रत्येक वंशानें आप-
आपल्या वतनाच्या मानानें नगरें लेव्यांस द्यावीं.

९ परमेश्वर मोशाला म्हणाला, १० इस्राएल लोकांस
सांग: तुम्ही यार्देन ओलांडून कनान देशांत
पोहंचाल ११ तेव्हां तुम्हांकरितां कांहीं नगरें शरणपुरें
म्हणून ठरवा; कोणाच्या हातून चुकीनें मनुष्यवध
झाला तर त्यानें तेथें पळून जावें. १२ सूड उगविणाऱ्या-
पासून शरणस्थानांदाखल हीं नगरें उपयोगी पडतील,
म्हणजे मंडळीसमोर खुनी मनुष्याचा न्याय होईपर्यंत
त्याला कोणास मारून टाकितां येणार नाहीं. १३ जीं
शरणपुरें तुम्ही द्याल तीं सहा असावीं. १४ तीन नगरें
यार्देनेच्या पूर्वेस आणि तीन नगरें कनान देशांत
द्यावीं; हीं शरणपुरें होत. १५ हीं सहा नगरें इस्रा-
एल लोकांसाठीं व त्यांच्यामध्यें राहणाऱ्या परदेश्यांसाठीं
शरणस्थानें म्हणून नेमिलीं आहेत; जो कोणी चुकून
मनुष्यवध करील त्यानें तिकडे पळून जावें. १६ तथापि
कोणी लोखंडी शस्त्रानें कोणाचा वध करील तर
त्यास खुनी समजावें; असल्या खुनी मनुष्यास अवश्य
जिवें मारावें. १७ मनुष्य मरेल असा धोंडा हातीं
घेऊन कोणीं कोणास फेकून मारला, व त्यानें तो
मेला तर तो मनुष्यहि खुनी होय; तसल्या मनुष्यास
अवश्य जिवें मारावें. १८ मनुष्य मरेल असें लाकूड
हातीं घेऊन कोणीं कोणास फेकून मारिलें, व त्यानें तो
मेला तर तो मनुष्यहि खुनी होय; तसल्या खुनी मनुष्यास
अवश्य जिवें मारावें. १९ रक्तपाताचा सूड घेणाऱ्यानें
स्वतः त्या खुनी मनुष्यास मारून टाकावें; जेथें तो
सांपडेल तेथें त्यास मारून टाकावें. २० कोणी एकाद्याचा
दावा धरून टपून बसून त्यास ढकलून देईल, किंवा
त्याजवर कांहीं फेकील व त्यामुळें तो मरेल; २१ अथवा
कोणी वैरभावानें त्याजवर हस्तप्रहार केल्यानें तो मरेल,
तर ज्यानें त्यास मारिलें त्यास अवश्य मारून टाकावें, तो
मनुष्य खुनी होय; रक्तपाताचा सूड घेणाऱ्यास तो
खुनी सांपडेल तेथें त्यानें त्यास जिवें मारावें.
२२ तथापि कोणी वैरभाव न ठेवितां कोणास
अकस्मात् ढकलील किंवा टपून न बसतां त्याजवर
कांहीं फेकील किंवा माणूस मरेल असा धोंडा हातीं
घेऊन नकळत कोणावर फेकील आणि त्यामुळें तो
मरेल, २३ आणि तो त्याचा शत्रु नसेल अथवा
त्यानें त्याची हानि करूं पाहिली नसेल, २४ तर
मंडळीनें मारणाऱ्याचा आणि रक्तपाताबद्दल सूड
घेणाऱ्याचा ह्या नियमांनुसार न्याय करावा; २५ त्या
मनुष्यवध करणाऱ्या मनुष्यास रक्तपाताबद्दल सूड
घेणाऱ्याच्या हातून सोडवून ज्या शरणपुरांत तो पळून
गेला होता तेथें त्याला मंडळीनें पोचतें करावें, आणि
त्यानें पवित्र तेलानें अभिषेक केलेला मुख्य याजक
मरेपर्यंत त्याच नगरांत राहावें. २६ तो मनुष्यवध
करणारा ज्या शरणपुरास पळून गेला असेल त्याच्या
शिवाराबाहेर कोठें गेला, २७ आणि रक्तपाताबद्दल
सूड घेणाऱ्यानें त्या शरणपुराच्या शिवाराबाहेर त्यास
गांठून मारून टाकिलें तर रक्तपाताचा दोष त्याला
लागावयाचा नाहीं; २८ कारण मुख्य याजक मरेपर्यंत
त्या मनुष्यवध करणाऱ्यानें शरणपुरांतच राहावयाचें;
मुख्य याजक मेल्यावर पाहिजे तर त्यानें आपल्या
वतनांत परत जावें. २९ तुमच्या पिढ्यानपिढ्या तुमच्या
सर्व वस्तीच्या ठिकाणीं न्यायाचा हा विधि नेमिलेला
आहे. ३० कोणीं एकाद्या मनुष्यास जिवें मारिलें
तर त्या मनुष्यवध करणाऱ्यास साक्षीदाराच्या साक्षी-

वरून मारावें; पण एकाच साक्षीदाराच्या साक्षीवरून
कोणास जिवें मारूं नये. ३१ कोणी मनुष्यवध करणारा
देहांतशासनास योग्य असला तर त्याच्या प्राणाबद्दल
खंड घेऊन त्याला सोडूं नये; त्यास अवश्य जिवें
मारावें. ३२ त्याप्रमाणेंच शरणपुरांत पळून गेलेला मनुष्य
याजक मरण्यापूर्वी आपल्या वतनांत जाण्याच्या हेतूनें
कांहीं खंड देऊं पाहील तर तो घेऊं नये. ३३ याप्रमाणें
ज्या देशचे तुम्ही रहिवासी व्हाल तो भ्रष्ट करूं नका;
खुनानें देश भ्रष्ट होतो; रक्तपात करणाऱ्या मनुष्याचा
रक्तपात केल्याशिवाय देशाबद्दल प्रायश्चित्त होत नाहीं.
३४ तर ज्या देशचे तुम्ही रहिवासी व्हाल त्यामध्यें मी
राहणार; तो भ्रष्ट करूं नका, कारण मी परमेश्वर
इस्राएल लोकांमध्यें वसत आहें.

३६ १ मग योसेफवंशाच्या कुळांपैकीं गिलाद
बिन माखिर बिन मनश्शे याच्या वंशांतील
पितृकुळाचे प्रमुख पुरुष मोशाकडे जाऊन
त्यास व इस्राएल लोकांच्या पितृकुळाच्या सरदारांस
म्हणाले, २ परमेश्वरानें आमच्या स्वामीस आज्ञा दिली
होती कीं चिठ्या टाकून इस्राएल लोकांमध्यें हा देश
वाटून द्यावा; आणखी परमेश्वरानें ही आज्ञा आमच्या
स्वामीस दिली होती कीं आमचा बंधु सलाफहाद
याच्या वतनाचा हिस्सा त्याच्या कन्यांस द्यावा;
३ तर इस्राएल लोकांच्या इतर कोणत्याहि वंशांतल्या
पुरुषांशीं त्यांचा विवाह झाला तर आमच्या दायभागां-
तून त्यांचा हिस्सा कमी होईल आणि ज्या वंशांत
त्या जातील त्या वंशाच्या वतनांत तो मिळून जाईल;
या प्रकारें आमच्या हिश्शाच्या वतनांतून तो कमी होईल.
४ इस्राएल लोकांचें योबेल वर्ष येईल तेव्हां ज्या
वंशांत त्या जातील त्याच्या वतनांत तो मिळून जाईल;
व अशानें त्याचें वतन आमच्या वंशाच्या दायभागांतून
कमी होईल. ५ तेव्हां परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें मोशानें
इस्राएल लोकांस सांगितलें कीं योसेफाचे वंशज म्हणतात
तें बरोबर आहे. ६ सलाफहादाच्या कन्यांसंबंधानें
परमेश्वरानें ही आज्ञा दिली आहे कीं त्यांस हवा तो वर
त्यांनीं निवडावा, पण त्यांनीं आपल्या मूळपुरुषाच्या
वंशाच्या कुळांतील वरांशींच विवाह करावा. ७ इस्रा-
एलाच्या कोणत्याहि वंशाचा वतनभाग इतर वंशाकडे
जाऊं नये; इस्राएल लोकांतील प्रत्येकानें आपल्या पितृ-
वंशांतल्या वतनास धरून राहावें. ८ इस्राएलाच्या
कोणत्याहि वंशांतील कोणत्याहि स्त्रीस दायभाग
मिळावयाचा असेल तर तिचा विवाह तिच्या पितृ-
वंशाच्या कुळांतील पुरुषाशींच व्हावा, म्हणजे इस्राएल
लोकांतील प्रत्येक जणाचा दायभाग त्याच्याकडेसच
राहील. ९ कोणत्याहि वंशाचे दायभाग इतर वंशांकडे
जाऊं नयेत; इस्राएल लोकांच्या प्रत्येक वंशानें आपल्या
वतनास धरून राहावें. १० परमेश्वरानें मोशाला आज्ञा
केली तीप्रमाणें सलाफहादाच्या कन्यांनीं केलें;
११ महला, तिरसा, हाग्ला, मिल्का व नोआ या
ज्या सलाफहादाच्या कन्या त्यांनीं आपल्या चुलत-
भावांशीं विवाह केला. १२ योसेफपुत्र मनश्शे याच्या
वंशांतल्या कुळांतच त्यांचा विवाह झाला आणि त्यांचा
दायभाग त्यांच्या पितृकुळाच्या वंशांत कायम राहिला.
१३ जे विधि व नियम परमेश्वरानें मवाबाच्या
मैदानांत यरीहोपाशीं यार्देन नदीतीरीं मोशाच्या द्वारें
इस्राएल लोकांस लावून दिले ते हे होत.

# अनुवाद



१ यार्देनेच्या पूर्वेस रानांतील अराबांत सूफा-
1 समोर पारान, तोफेल, लाबान, हसेरोथ, व दी-जाहाब
यांच्या दरम्यान जे शब्द मोशे इस्राएल लोकांशीं
बोलला ते हे: २ होरेबाहून कादेश-बर्ण्यापर्यंत सेईर
डोंगरावरून अकरा दिवसांची वाट आहे. ३ चाळिसाव्या
वर्षाच्या अकराव्या महिन्याच्या प्रतिपदेस जें कांहीं
इस्राएल लोकांस सांगावें म्हणून परमेश्वरानें मोशाला
आज्ञा दिली होती, त्याप्रमाणें त्यानें हें सर्व
सांगितलें; ४ मोशानें अमोऱ्यांचा राजा हेशबोननिवासी
सीहोन आणि बाशानाचा राजा अष्टरोथनिवासी ओग
यांस एद्रेई नगरांत ठार मारिल्यावर, ५ यार्देनेच्या पूर्वेस
मवाब देशांत मोशे नियमशास्त्राचें विवरण करूं लागला,
तें असें: ६ परमेश्वर आमचा देव यानें होरेबांत
आम्हांस सांगितलें कीं तुम्ही या डोंगरवटींत राहिल्यास
बरेच दिवस झाले; ७ तर आतां येथून निघून कूच करा,
आणि अमोऱ्यांचा पहाडी प्रदेश आणि त्याच्या आस-
पासचा सर्व प्रदेश यांत म्हणजे अराबांत, डोंगरवटींत,
तळवटींत, दक्षिणदेशीं, समुद्रतीरीं, लबानोन पर्वता-
पर्यंत आणि महानदी फरात येथपर्यंत राहणाऱ्या
कनानी लोकांच्या देशांत चला. ८ पाहा, हा सर्व देश
तुम्हांस मीं दाखवून दिला आहे; तर जो देश परमे-
श्वरानें तुमचे पूर्वज अब्राहाम, इसहाक व याकोब
यांना व त्यांच्यामागून त्यांच्या वंशजांना शपथपूर्वक
देऊं केला आहे, त्यांत जाऊन तो हस्तगत करा.
९ त्या प्रसंगीं मीं तुम्हांस सांगितलें होतें कीं मला
एकट्याला तुमचा भार सहन करवत नाहीं; १० कारण
तुमचा देव परमेश्वर यानें तुम्हांस बहुगुणित केलें
असून तुमची संख्या आज आकाशांतील ताऱ्यांइतकी
आहे. ११ तुमच्या पूर्वजांचा देव परमेश्वर तुम्ही आतां
आहां त्याच्यापेक्षां सहस्रपट तुम्हांस वाढवो, आणि
आपल्या वचनाप्रमाणें तो तुमचें अभीष्ट करो.
१२ तुमची दगदग, तुमचा भार व तुमचीं भांडणें हीं
मी एकटा कोठवर सोसूं? १३ तर तुम्ही आपआपल्या
वंशांतून बुद्धिमान्, समजदार आणि प्रसिद्ध पुरुष
निवडा म्हणजे मीं त्यांस तुमचे प्रमुख नेमितों.
१४ तेव्हां तुम्हीं मला उत्तर दिलें कीं तूं सांगतोस
तसें करणें ठीक आहे; १५ म्हणून तुमच्या वंशांपैकीं
बुद्धिमान् व प्रसिद्ध अशा मुख्य पुरुषांस निवडून
तुमचे प्रमुख नेमिले, म्हणजे तुमच्या वंशावंशाप्रमाणें
हजाराहजारांवर, शंभराशंभरांवर, पन्नासापन्नासांवर
व दहादहांवर नायक व अमलदार नेमून दिले.
१६ त्या समयीं मीं तुमच्या न्यायाधीशांस आज्ञा केली
कीं तुम्ही आपल्या भाऊबंदांच्या फिर्यादी ऐका; एखादा
माणूस व त्याचा बांधव व त्याच्याजवळचा परदेशी
यांच्यामध्यें धर्मानें न्याय करा. १७ न्याय करितांना
पक्षपात करूं नका, लहानमोठ्यांचें सारखेंच ऐकून
घ्या; कोणाचें तोंड पाहून भिऊं नका; कारण न्याय
परमेश्वराकडचा आहे; एखादें प्रकरण तुम्हांस अवघड
वाटलें तर तें मजकडे घेऊन या म्हणजे मी तें ऐकेन.
१८ त्या समयीं तुमचें सर्व कर्तव्यकर्म मीं तुम्हांस
सांगून दिलें होतें.

१९ मग आपण होरेबाहून कूच करून आपला
देव परमेश्वर याच्या आज्ञेनुसार जें घोर व
भयानक रान अमोऱ्यांच्या पहाडी प्रदेशाकडे जातांना
तुम्हांस लागलें, तें सर्व आक्रमून कादेश-बर्ण्यापर्यंत
पोहंचलों. २० तेव्हां मीं तुम्हांस सांगितलें कीं
अमोऱ्यांचा जो पहाडी प्रदेश परमेश्वर आपला देव
आपणांस देत आहे तेथपर्यंत तुम्ही आलां आहां.
२१ पाहा, तो देश तुझा देव परमेश्वर यानें तुला
दाखवून दिला आहे; तुझ्या पूर्वजांचा देव परमेश्वर
याच्या आज्ञेप्रमाणें त्यावर चढाई करून जाऊन तो
हस्तगत कर; तूं भिऊं नको अथवा कचरूं नको.

२२ तेव्हां तुम्ही सर्व मजकडे येऊन म्हणालां, आम्ही आमच्यापुढें मनुष्यें पाठवितों, म्हणजे तीं त्या देशाचा पत्ता लावून कोणत्या मार्गानें आम्हांला जावें लागेल व कोणकोणत्या नगरांत प्रवेश करावा लागेल याची आम्हांस खबर देतील. २३ ही गोष्ट मला ठीक वाटली म्हणून प्रत्येक वंशामागें एक असे तुम्हांतले बारा पुरुष मीं निवडून काढिले; २४ ते निघाले आणि डोंगर-वटी चढून वर गेले आणि अश्कोल नाल्यापर्यंत जाऊन त्यांनीं देश हेरिला; २५ आणि ते त्या देशचीं कांहीं फळें हातीं घेऊन आम्हांकडे आले, आणि त्यांनीं आम्हांस अशी खबर दिली कीं जो देश आमचा देव परमेश्वर आम्हांस देत आहे तो चांगला आहे. २६ तरी तुम्ही तेथें जाण्यास राजी झालां नाहीं; आपला देव परमेश्वर याचें वचन तुम्हीं जुमानिलें नाहीं; २७ तुम्हीं आपल्या डेऱ्यांत कुरकुर चालविली व म्हटलें कीं परमेश्वर आम्हांशीं वैर करीत आहे, आणि म्हणूनच आम्हांस अमोऱ्यांच्या हातीं देऊन आमचा सत्यनाश करावा या हेतूनें त्यानें आम्हांस मिसर देशांतून काढून आणिलें आहे. २८ आम्ही जाणार तें कोठें? तेथील लोक आम्हांहून मोठे व धिप्पाड आहेत, तेथील नगरें मोठीं असून त्यांचे तट गगनापर्यंत गेले आहेत, आणि तेथें अनाकाचे वंशज आमच्या दृष्टीस पडले, असें आमच्या बांधवांनीं आम्हांस सांगून आमच्या हृदयाचें पाणी पाणी केलें. २९ तेव्हां मी तुम्हांस म्हणालों, तुम्ही त्यांस घाबरूं नका, त्यांस भिऊं नका. ३० तुमचा देव परमेश्वर तुमचा अग्रगामी आहे, त्यानें मिसर देशांत तुमच्यादेखत जसें सर्व कांहीं केलें तसें करून तो तुमच्यासाठीं लढेल; ३१ आणि तुम्हीं रानांतहि पाहिलें कीं येथवर येऊन पोंचेपर्यंत जो सारा मार्ग तुम्हीं आक्रमिला त्यांत तुमचा देव परमेश्वर यानें मनुष्य आपल्या पुत्रास वागवितो त्याप्रमाणें तुम्हांस वागविलें. ३२ एवढें करूनहि तुम्हीं आपला देव परमेश्वर याजवर विश्वास ठेविला नाहीं. ३३ तुमच्या-साठीं डेरे देण्यास ठिकाण पाहावें आणि रात्रीं अग्नींत व दिवसां मेघांत प्रकट होऊन तुमचा मार्गदर्शक व्हावें म्हणून तो तुमचा अग्रगामी झाला. ३४ तेव्हां तुमचें बोलणें ऐकून परमेश्वर कोपला आणि शपथ वाहून म्हणाला, ३५ जो चांगला देश देण्याचें मीं तुमच्या पूर्वजांस शपथपूर्वक वचन दिलें होतें, तो देश या दुष्ट पिढीच्या लोकांपैकीं एकाच्याहि दृष्टीस मुळींच पडणार नाहीं; ३६ यफुन्नेचा पुत्र कालेब हा मात्र तो देश पाहील; ज्या भूमीला त्याचे पाय लागले ती मी त्याला व त्याच्या वंशजांस देईन; कारण तो पूर्णपणें परमेश्वराला अनुसरला आहे. ३७ त्याप्रमाणें तुमच्यामुळें परमेश्वर मजवरहि रागावून म्हणाला, तूंहि त्या देशीं जावयाचा नाहींस; ३८ नूनाचा पुत्र यहोशवा जो तुझ्या सेवेस हजर असतो तो तेथें जाईल, तूं त्यास धीर दे; कारण तो तें वतन इस्राएल लोकांस मिळवून देईल; ३९ आणि ज्या मुलांबाळांविषयीं तुम्हीं म्हटलें होतें कीं हीं लूट होतील तीं, आणि जीं अर्भकें त्या समयीं बऱ्यावाइटाचा भेद जाणत नव्हतीं तीं त्या देशीं जातील; मी तो त्यांस देईन व तीं त्याचें वतन पावतील. ४० तुम्हांस पाहिजे तर तुम्ही परत जा, आणि तांबड्या समुद्राच्या मार्गानें रानांत प्रवास करा. ४१ तेव्हां तुम्हीं मला उत्तर दिलें कीं आम्हीं परमेश्वराचा अपराध केला आहे, तर आमचा देव परमेश्वर यानें आम्हांस आज्ञा केल्याप्रमाणें आम्ही वर चढून जाऊं व युद्ध करूं; मग तुम्हीं युद्धाच्या शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन डोंगर चढून जाण्याचें धाडस केलें. ४२ तेव्हां परमेश्वरानें मला सांगितलें, त्यांस सांग, तुम्ही जाऊं नका व लढाई करूं नका, कारण मी तुमच्यामध्यें नाहीं म्हणून शत्रु तुमचा मोड करील. ४३ त्याप्रमाणें मीं तुम्हांस सांगितलें, पण तुम्हीं ऐकलें नाहीं; तर परमेश्वराच्या आज्ञेविरुद्ध तुम्हीं बंडावा केला आणि साहस करून डोंगरावर चढून गेलां. ४४ तेव्हां त्या डोंगरांत राहणाऱ्या अमोऱ्यांनीं बाहेर पडून तुम्हांशीं सामना करून मधमाश्यांप्रमाणें तुमचा पाठ-लाग केला, आणि सेईर देशांतील हर्मापर्यंत तुम्हांस मार देत नेलें. ४५ तेव्हां तुम्ही माघारे येऊन परमेश्वराजवळ रडूं लागलां; पण परमेश्वरानें तुमचा

शब्द ऐकला नाहीं, तुमच्याकडे कान दिला नाहीं.
४६ तेव्हां तुम्ही कादेशांत बरेच दिवस वस्तीस
राहिलां तें तुम्हांला ठाऊकच आहे.

२ १ मग परमेश्वरानें मला सांगितल्याप्रमाणें
आपण मागें फिरून तांबड्या समुद्राच्या वाटेनें
रानाकडे कूच केलें आणि बहुत दिवस सेईर
पहाडास वळसा घालीत राहिलों. २ परमेश्वरानें मला
सांगितलें, ३ या पहाडास तुम्ही बहुत दिवस वळसा
घालीत राहिलां आहां तेवढा पुरे; तर आतां उत्तर
दिशेकडे वळा; ४ आणि तूं लोकांस माझी आज्ञा सांग
कीं सेईरनिवासी तुमचे भाऊबंद जे एसावाचे वंशज
त्यांच्या सीमेंतून तुम्हांस जावयाचें आहे; त्यांस तुमची
भीति वाटेल यासाठीं तुम्ही फार संभाळा; ५ त्यांशीं
झगडूं नका; त्यांच्या देशांतली पाऊलभरहि जमीन मी
तुम्हांस देणार नाहीं; कारण सेईर पर्वत एसावास वतन
म्हणून मीं दिला आहे. ६ तुम्हीं पैसे देऊन त्यांच्या-
पासून अन्न विकत घेऊन खा आणि पैसे देऊन प्यावयास
पाणीहि विकत घ्या.. ७ कारण तुझा देव परमेश्वर
यानें तुझ्या हातच्या सगळ्या कामाला यश दिलें
आहे; ह्या महारण्यांतलें तुझें भ्रमण त्याला ठाऊक
आहे; आज चाळीस वर्षें तुझा देव परमेश्वर तुझ्या-
बरोबर राहिला आहे; तुला कशाचीहि वाण पडली
नाहीं. ८ ह्याकरितां सेईरनिवासी आपले भाऊबंद
एसावाचे वंशज यांना बाजूस सोडून आपण अराबाच्या
मार्गानें एलाथ व एसयोन-गेबेर हीं मागें टाकून चाललों.

मग आपण वळसा घेऊन मवाबांतील रानांच्या
मार्गानें गेलों. ९ तेव्हां परमेश्वरानें मला सांगितलें,
मवाबास उपद्रव करूं नका व त्यांच्याशीं युद्धाचा प्रसंग
आणूं नका; मी त्यांचा देश तुम्हांस वतन करून देणार
नाहीं; कारण आर नगर मीं लोटाच्या वंशजांस वतन
करून दिलें आहे. १० (पूर्वकाळीं तेथें एमी लोक राहत
होते; ते अनाकी लोकांसारखे प्रबळ, बहुत व धिप्पाड
होते; ११ अनाकी लोकांप्रमाणें त्यांसहि रेफाई म्हणत,
पण मवाबी लोक त्यांस एमी म्हणतात. १२ तसेंच
पूर्वकाळीं सेईरांत होरी लोकहि राहत असत; त्यांच्या
मागून एसावाचे वंशज आले; त्यांनीं त्यांचा संहार
करून त्यांच्या ठिकाणीं वस्ती केली, इस्राएल लोकांनीं
परमेश्वरानें दिलेल्या देशाचें जसें केलें तसेंच त्यांनींहि
केलें.) १३ तर आतां उठा, जेरेद ओहळापलीकडे जा.
तेव्हां आपण जेरेद ओहळापलीकडे गेलों. १४ आपण
कादेश-बर्ण्या सोडून जेरेद ओहळापलीकडे गेलों.
त्यास अडतीस वर्षें होऊन गेलीं; इतक्या अवधींत
परमेश्वराच्या प्रतिज्ञेप्रमाणें त्या पिढींतल्या योद्ध्यांचा
छावणींत संहार झाला. १५ त्यांचा नायनाट होईपर्यंत
छावणींतून संहार करावा म्हणून परमेश्वराचा हात
त्यांवर उगारलेला होता.

१६ या प्रकारें सर्व योद्धे मरून गेले, आणि लोकां-
तून त्यांचा उच्छेद झाला, १७ तेव्हां परमेश्वरानें मला
सांगितलें, १८ आतां मवाबाची सरहद्द म्हणजे आर
ओलांडून पलीकडे तुला गेलें पाहिजे; १९ अम्मोनी
लोकांजवळ जाऊन तूं पोहंचशील तेव्हां त्यांस उपद्रव
करूं नको व त्यांशीं झगडा करूं नको; कारण अम्मोनी
लोकांच्या देशांतलें तुला मी कांहींहि वतन करून
देणार नाहीं; कारण लोटाच्या वंशजांस तो मीं वतन
करून दिला आहे. २० त्या देशास सुद्धां रेफाईचा देश
म्हणतात; पूर्वी तेथें रेफाई राहत असत; अम्मोनी लोक
त्यास जमजुम्मी म्हणतात; २१ ते लोकहि अनाकी
लोकांप्रमाणें प्रबळ, बहुत व धिप्पाड होते; पण त्यांचा
परमेश्वरानें अम्मोन्यांपुढून संहार केला; ते त्यांच्या
मागून येऊन त्यांच्या जागीं राहिले; २२ सेईरनिवासी
एसावाच्या वंशजांपुढून परमेश्वरानें होऱ्यांचा संहार
केला, त्याप्रमाणें त्यानें यांचाहि केला; ते त्यांच्या मागून
येऊन त्यांच्या ठिकाणीं आजवर वस्ती करून आहेत.
२३ तसेंच अव्वी हे गज्जा नगरापर्यंत खेड्यापाड्यांत
वस्ती करून होते त्यांचा कफतोराहून आलेले कफतोरी
यांनीं संहार करून त्यांच्या ठिकाणीं वस्ती केली.
२४ तर उठा, कूच करून आर्णोन खोरें उतरून जा;
पाहा, हेशबोनचा राजा अमोरी सीहोन आणि त्याचा देश
मी तुझ्या हातीं देत आहें; तो देश तूं आपल्या ताब्यांत
घेऊं लाग आणि त्याशीं संग्राम कर. २५ जेवढे

लोक नभोमंडळाखालीं वसत आहेत त्या सर्वांच्या
मनांत आज मी तुजविषयीं दहशत आणि भीति उत्पन्न
करूं लागेन, म्हणजे ते तुझें वर्तमान ऐकून तुझ्या
भीतीनें थरकांप पावतील व घाबरतील.
२६ मीं कदेमोथ रानांतून हेशबोनचा राजा
सीहोन याजकडे दूतांच्या हातीं सलुख्याचा हा निरोप
पाठविला कीं २७ मला तुझ्या देशांतून जाऊं दे; मी
आपला नीट मार्गानें जाईन, उजवीडावीकडे वळणार
नाहीं. २८ तूं पैसे घेऊन मला खावयास अन्न
विकत दे आणि पैसे घेऊन मला प्यावयास पाणी दे;
मात्र मला पायांनीं तुझ्या देशांतून जाऊं दे; २९ सेईर-
निवासी एसावाचे वंशज आणि आरनिवासी मवाबी
हे जसे मजशीं वागले तसाच तूंहि वाग म्हणजे मी
यार्देनेपलीकडे जाऊन आमचा देव परमेश्वर यानें
आम्हांस दिलेल्या देशीं पोहंचेन; ३० पण हेशबोनचा
राजा सीहोन आम्हांस आपल्या देशांतून जाऊं देईना;
कारण तुझा देव परमेश्वर यानें त्यास तुझ्या हातीं
द्यावें म्हणून त्याचें मन कठोर केलें व त्याचें हृदय
उन्मत्त केलें; आज हें विदितच आहे. ३१ परमे-
श्वरानें मला सांगितलें, पाहा, सीहोन व त्याचा देश मी
तुझ्या ताब्यांत देऊं लागलों आहें; तो देश तुझें वतन
व्हावें म्हणून हस्तगत करावयास लाग. ३२ तेव्हां
सीहोन आपली सर्व सेना घेऊन बाहेर निघाला आणि
आम्हांशीं याहस येथें युद्ध करावयास आमच्यावर
चालून आला. ३३ मग आमचा देव परमेश्वर यानें
त्याला आमच्या हवालीं केलें, आणि आम्हीं त्याचा,
त्याच्या पुत्रांचा व त्याच्या सर्व सेनेचा संहार केला.
३४ त्या प्रसंगीं आम्हीं त्याचीं सर्व नगरें घेतलीं आणि
हरएक वसलेल्या नगरांतील स्त्रिया व मुलेंबाळें यांसह
त्यांचा एवढा विध्वंस केला कीं त्यांचें कोणीहि उरलें
नाहीं; ३५ जिंकिलेल्या नगरांतल्या लुटीबरोबर त्यांचीं
जनावरेंहि आम्हीं लुटून नेलीं. ३६ आर्णोन खोऱ्याच्या
कडेपाशीं अरोएर नगर आहे तेथून, व खोऱ्यांत जें
नगर आहे तेथून गिलादापर्यंत आम्हांला दुर्गम असें
एकहि नगर राहिलें नाहीं; आमचा देव परमेश्वर यानें तीं
सर्व आमच्या स्वाधीन करून दिलीं; ३७ मात्र
अम्मोनी वंशजांच्या देशांत, यब्बोक नदीच्या तीरींच्या
प्रदेशांत, डोंगरवटींतील सर्व नगरांत आणि आमचा
देव परमेश्वर यानें ज्या ज्या ठिकाणीं जाण्याचें आम्हांस
मना केलें त्या त्या ठिकाणीं तुम्ही गेलां नाहीं.
१ मग आम्ही वळसा घेऊन बाशानाच्या वाटेनें
३ चढून गेलों तेव्हां बाशानाचा राजा ओग आपली
सर्व सेना घेऊन एद्रई येथें सामना करावयास
बाहेर निघाला. २ तेव्हां परमेश्वरानें मला सांगितलें
कीं त्यांस भिऊं नको; कारण तो, त्याची सर्व सेना
आणि त्याचा देश हीं मीं तुझ्या हातीं दिलीं आहेत,
आणि जसें तूं हेशबोननिवासी अमोऱ्यांचा राजा
सीहोन याचें केलें तसेंच त्याचेंहि कर. ३ आपला देव
परमेश्वर यानें बाशानाचा राजा ओग व त्याचे सर्व
लोक यांस आमच्या हातीं दिलें आणि आम्हीं त्यांस
असा मार दिला कीं त्यांपैकीं कोणीहि उरला नाहीं.
४ त्या प्रसंगीं आम्हीं त्याचीं सर्व नगरें घेतलीं; आम्हीं
त्यांचें घेतलें नाहीं असें एकहि नगर राहिलें नाहीं;
आम्हीं साठ नगरें घेतलीं, म्हणजे अर्थात् अर्गोबाचा
प्रदेश घेतला, बाशानांतलें ओगचें राज्य तें हेंच.
५ हीं सर्व तटबंदी नगरें असून त्यांचे तट उंच होते
आणि त्यांस वेशी व अडसर होते, यांशिवाय
आणखी खेडींपाडीं होतीं. ६ हेशबोनचा राजा सीहोन
याच्या नगरांप्रमाणें त्या नगरांचाहि विध्वंस आम्हीं केला
व मुलांबाळांसह सर्व वसलेल्या नगरांचा सर्वस्वीं विध्वंस
केला; ७ पण सर्व गुरेंढोरें व नगरांतली लूट आम्हीं
हरण केली. ८ या प्रकारें आम्हीं त्या समयीं यार्देनेच्या
पूर्व थडीस राहणारे अमोऱ्यांचे दोन्ही राजे यांच्या
हातचा आर्णोन खोऱ्यापासून हर्मोन पर्वतापर्यंतचा
सर्व देश घेतला; ९ (हर्मोनास सिदोनी लोक
सिर्योन आणि अमोरी लोक सनीर म्हणतात;)
१० माळावरलीं सर्व नगरें, सर्व गिलाद प्रांत आणि
सल्का व एद्रई येथवर ओगाच्या राज्यांतील नगरें
एवढा सर्व बाशान प्रांत आम्हीं काबीज केला. ११
(रेफाई लोकांपैकीं जे शेष राहिले त्यांतून बाशानाचा

राजा ओग एवढाच उरला; त्याचा पलंग लोखंडाचा
होता; तो अम्मोन्यांच्या राब्बा नगरांत अजून
आहे ना ! पुरुषाच्या हातानें याची लांबी नऊ हात
आणि रुंदी चार हात आहे.) १२ त्या समयीं आम्हीं
देश काबीज केला तो एवढा: आर्णोन खोऱ्याच्या
सीमेवरल्या अरोएर नगरापासून गिलादी डोंगराळ
प्रदेशाचा अर्धा भाग व त्यांतील सगळीं नगरें; हीं मीं
रऊबेनी व गादी यांस दिलीं; १३ गिलादाचा उरलेला
भाग आणि सर्व बाशान म्हणजे ओगाच्या राज्यांत
असलेला अर्गोबचा सारा प्रदेश हे मीं मनश्शाच्या
अर्ध्या वंशास दिले (यालाच रेफाईंचा देश म्हणतात.
१४ मनश्शाचा पुत्र याईर यानें गशूरी व माकाथी
यांच्या सीमेपर्यंत अर्गोबचा सर्व प्रदेश हस्तगत केला
आणि बाशानास आपलें नांव म्हणजे हव्वोथ-
याईर असें ठेविलें, तेंच आजवर चालत आहे)
१५ गिलाद देश मीं माखीर यास दिला. १६ रऊ-
बेनी व गादी यांस मीं गिलादापासून आर्णोन खोऱ्या-
पर्यंतचा देश दिला; अर्थात् त्या खोऱ्याच्या मध्यभागा-
पर्यंत आणि अम्मोन्यांच्या सीमेवरील यब्बोक नदीपर्यंत
त्यांची सरहद्द ठरली; १७ तसाच किन्नेरेथापासून
अराबाचा समुद्र म्हणजे क्षारसमुद्र येथवर पिसगाच्या
उतरणीखालील अराबा व यार्देनेच्या पूर्वेकडील सर्व
प्रदेश त्यांस दिला.

१८ त्या समयीं मीं तुम्हांस आज्ञा केली कीं
तुमचा देव परमेश्वर यानें तुम्हांस हा देश वतन
म्हणून दिला आहे तर तुम्ही सर्व योद्धे हत्यारबंद
होऊन आपल्या इस्राएल बांधवांबरोबर पैलतीरीं जा;
१९ पण तुमच्या स्त्रिया, मुलेंबाळें व पशु (तुमचीं
गुरेंढोरें बहुत आहेत हें मला ठाऊक आहे) या सर्वांनीं
मीं तुम्हांस दिलेल्या नगरांत वस्ती करून राहावें;
२० आणि तुमच्याप्रमाणेंच तुमच्या बांधवांस परमेश्वर
विश्राम देईल; आणि तुमचा देव परमेश्वर यानें त्यांस
देऊं केलेला यार्देनेपलीकडचा देश त्यांनीं ताब्यांत
घेतला म्हणजे जो प्रदेश मीं तुम्हांस दिला आहे तेथें
तुम्ही आपआपल्या वतनावर परत या. २१ मग मीं
त्या समयीं यहोशवास अशी आज्ञा दिली कीं तुमचा
देव परमेश्वर यानें या दोन राजांचें काय केलें हें तूं
आपल्या डोळ्यांनीं पाहिलें आहे. तूं नदी उतरून ज्या
ज्या राज्यांत जाशील त्या त्या सर्वांचें परमेश्वर असेंच
करणार. २२ तुम्ही त्यांस भिऊं नका, कारण तुमच्या
बाजूनें युद्ध करणारा तुमचा देव परमेश्वर आहे.
२३ त्या समयीं मीं परमेश्वराची काकळूत करून
म्हटलें, २४ हे प्रभो देवा, तूं आपल्या दासांस आपला
प्रताप व आपला बलिष्ठ हस्त दाखवूं लागला आहेस;
तुझ्यासारखी करणी करणारा व पराक्रमी देव स्वर्गांत
अथवा पृथ्वीवर कोणी आहे काय ! २५ तर मला पार
उतरून जाऊं दे आणि यार्देनेपलीकडे असलेला तो
उत्तम देश, तो उत्तम पर्वत आणि लबानोन हीं माझ्या
दृष्टीस पडूं दे. २६ पण परमेश्वर तुमच्या पायीं मजवर
रुष्ट झाला आणि माझें त्यानें ऐकलें नाहीं. परमेश्वर
मला म्हणाला, पुरें, ही गोष्ट पुन्हां मजजवळ काढूं नको.
२७ पिसगाच्या शिखरावर चढून जा आणि पूर्व,
पश्चिम, उत्तर व दक्षिण अशा चोहों दिशांकडे दृष्टि
लावून तो देश पाहून घे; कारण तुला यार्देनेपलीकडे
जावयाचें नाहीं. २८ आणि यहोशवास अधिकारा-
रूढ कर व धीर देऊन दृढ कर, कारण या
लोकांच्या पुढें तोच चालेल आणि जो देश
तुझ्या दृष्टीस पडेल तो त्यांस वतन करून देईल.
२९ यास्तव आम्ही बेथ-पौराच्या समोरील खोऱ्यांत
वस्तीस राहिलों.

४

१ आतां, हे इस्राएल लोकहो, जे विधि व नियम
तुम्हीं पाळावे म्हणून मी तुम्हांस शिकवीत आहें ते
ऐकून घ्या; त्यायोगें तुम्ही जीवंत राहाल आणि
तुमच्या पूर्वजांचा देव परमेश्वर तुम्हांस जो देश देत
आहे त्याचें वतन पावाल. २ जी आज्ञा मी तुम्हांस देत
आहें तींत अधिकउणें कांहीं करूं नका, अशासाठीं
कीं तुमचा देव परमेश्वर याच्या ज्या ज्या आज्ञा मी
तुम्हांस ऐकवीत आहें त्या तुम्हीं पाळाव्या. ३ बाल-
पौराच्या प्रकरणीं परमेश्वरानें काय केलें तें तुम्हीं
आपल्या डोळ्यांनीं पाहिलें आहे; जे लोक बालपौराच्या

मरों लागले त्या सर्वांचा तुमचा देव परमेश्वर यानें
तुमच्यामधून विध्वंस केला; ४ पण जे तुम्ही आपला
देव परमेश्वर यास धरून राहिलां ते सगळे आज
जीवंत आहां. ५ पाहा, मीं तर आपला देव परमेश्वर
याच्या आज्ञेप्रमाणें तुम्हांस विधि व नियम शिकविले
आहेत ते अशासाठीं कीं ज्या देशाचें वतन पावण्यास
तुम्ही जात आहां त्यांत तुम्हीं त्यांप्रमाणें चालावें.
६ तुम्हीं ते मान्य करून पाळावे, कारण तेणेंकरून देशो-
देशींच्या लोकांच्या दृष्टीसमोर तुमची बुद्धि व समंजस-
पणा प्रगट होईल; हे सर्व विधि ऐकून ते म्हणतील
कीं हें मोठें राष्ट्र खरोखर बुद्धिमान् व समंजस
लोकांचें आहे. ७ आमचा देव परमेश्वर याचा आम्ही
धावा करितों तेव्हां तो आमच्यासमीप असतो.
ज्याचा देव या प्रकारें समीप असतो असें दुसरें मोठें
राष्ट्र कोणतें आहे? ८ जें हें नियमशास्त्र मी आज
तुम्हांस लावून देत आहें त्यांतल्यासारखे यथार्थ विधि
व नियम ज्याचे आहेत असें दुसरें मोठें राष्ट्र कोणतें
आहे? ९ मात्र तूं सावध राहा आणि आपणाला
अतिशयित जप; नाहीं तर ज्या गोष्टी डोळ्यांनीं
पाहिल्या त्या तूं विसरून जाशील आणि जन्मभर त्या
तुझ्या मनांतून जातील; त्या तूं आपल्या पुत्रपौत्रांस
विदित कराव्या. १० ज्या दिवशीं तूं होरेबानजीक
आपला देव परमेश्वर याच्यासमोर उभा राहिलास त्या
दिवसाची आठवण ठेव; तेव्हां परमेश्वरानें मला
सांगितलें कीं या लोकांस माझ्याजवळ एकत्र जमीव
म्हणजे मी आपलीं वचनें त्यांस ऐकवीन, यासाठीं कीं
इहलोकीं ते जीवंत असतील तितके दिवस त्यांनीं माझें
भय बाळगावयास शिकावें व आपल्या मुलांबाळांसहि
तें शिकवावें. ११ त्या दिवशीं तुम्ही जवळ जाऊन त्या
पर्वताच्या पायथ्याशीं उभे राहिलां; तेव्हां पर्वतावरची
ज्वाला गगनमंडल भेदून चालली होती आणि त्यावर
काळोख, मेघ व निबिड अंधकार हे पसरले होते.
१२ तेव्हां परमेश्वरानें त्या अग्नीमधून तुम्हांशीं भाषण
केलें; तुम्हीं शब्द ऐकला; पण कांहीं आकृति पाहिली
नाहीं; वाणी मात्र ऐकली. १३ त्यानें तुम्हांस आपला
करार विदित करून तो पाळण्याची आज्ञा केली; हा
करार म्हणजे तीं दहा वचनें होत; तीं त्यानें दोन
दगडी पाट्यांवर लिहून दिलीं. १४ त्या समयीं
परमेश्वरानें तुम्हांस विधि व नियम शिकविण्याची आज्ञा
मला केली, यासाठीं कीं तुम्ही पैलतीरीं जाऊन ज्या
देशाचें वतन पावणार आहां त्यांत तुम्हीं ते पाळावे.
१५ याकरितां तुम्ही आपणांसंबंधानें सावधगिरी ठेवा,
कारण परमेश्वरानें तुम्हांशीं होरेब पर्वतावर अग्नींतून
भाषण केलें तेव्हां कांहीं आकृति तुमच्या दृष्टीस पडली
नाहीं; १६ तुम्ही बिघडून जाऊन कोणा पुरुषाची
अगर स्त्रीची, १७ पृथ्वीवर संचार करणाऱ्या कोणा
पशूची किंवा अंतराळांत उडणाऱ्या कोणा पक्ष्याची,
१८ भूमीवर रांगणाऱ्या कोणा जंतूची अथवा पृथ्वीवरील
जलामध्यें राहणाऱ्या कोणा मत्स्याची प्रतिमा करूं
नये; १९ अथवा आकाशाकडे डोळे लावून सूर्य,
चंद्र, तारे अर्थात् आकाशांतील तारागण पाहून
बहकून जाऊन त्यास दंडवत घालूं नये व त्यांची
उपासना करूं नये; हीं तुमचा देव परमेश्वर यानें
नभोमंडळाखालील सर्व देशांच्या लोकांस देऊन ठेविलीं
आहेत. २० आणखी तुम्हांस परमेश्वरानें लोखंडी भट्टी-
तून, मिसर देशांतून बाहेर काढिलें आहे, यासाठीं कीं
तुम्हीं आज आहांत त्याप्रमाणें त्याची खास[1] प्रजा व्हावें.
२१ मग तुमच्यामुळें परमेश्वरानें मजवर कोपून अशी
शपथ वाहिली कीं तुला यार्देनेच्या पार जावयाचें नाहीं,
व जो उत्तम देश इस्राएलाचा देव परमेश्वर त्यांस वतन
करून देत आहे त्यांत तुझा प्रवेश व्हावयाचा नाहीं;
२२ म्हणून मला या देशांत मरणें भाग आहे, मला
यार्देनेच्या पार जावयाचें नाहीं; पण तुम्ही पार जाऊन
तो उत्तम देश ताब्यांत घ्या. २३ तुम्ही आपल्यासंबंधानें
सावधगिरी ठेवा; तुमचा देव परमेश्वर यानें तुमच्याशीं
करार केला आहे तो विसरून तुझा देव परमेश्वर यानें
तुला मनाई केलेल्या कोणत्याहि वस्तूच्या आकाराची
कोरींव प्रतिमा करूं नये. २४ कारण तुझा देव परमे-
श्वर भस्म करणाऱ्या अग्नीसारखा ईर्ष्यावान् देव आहे.

१ मुळांत: वतनाची.

२५ त्या देशांत राहून बहुत काळ लोटल्यावर तुम्हांस पुत्रपौत्र झाले म्हणजे तुम्ही बिघडून एकाद्या वस्तूच्या आकाराची कोरींव मूर्ति कराल, आणि आपला देव परमेश्वर याच्या दृष्टीनें जें वाईट तें करून त्याचा राग चेतवाल, २६ तर आज आकाश व पृथ्वी यांस साक्षी ठेवून मी सांगतों कीं ज्या देशाचें वतन पावण्यास तुम्ही यार्देन नदी ओलांडून जात आहां तेथून तुमचा अगदीं नायनाट होईल, त्यांत तुमचें राहणें बहुत दिवस व्हावयाचें नाहीं, तर तुमचा समूळ नाश होईल. २७ परमेश्वर तुम्हांस इतर राष्ट्रांत विखरील; ज्या ज्या लोकांत परमेश्वर तुम्हांस लावून देईल तेथें तुमची संख्या अल्प राहील. २८ तेथें मनुष्याच्या हातांनीं घडलेल्या काष्ठपाषाणादिकांच्या देवांची, जे पाहत नाहींत, ऐकत नाहींत, खात नाहींत, हुंगीत नाहींत, अशांची सेवा कराल. २९ तरी पण तेथेंहि तुम्ही आपला देव परमेश्वर यास शरण जाल आणि पूर्ण जिवेंभावें त्याच्या शोधास लागाल तर तो तुम्हांस पावेल. ३० तूं संकटांत पडशील आणि तुजवर हीं सर्व अरिष्टें येऊन कोसळतील, तेव्हां शेवटीं तूं आपला देव परमेश्वर याजकडे फिरशील आणि त्याची वाणी ऐकशील; ३१ कारण तुझा देव परमेश्वर हा दयाळू देव आहे; तो तुला दगा देणार नाहीं, तुझा नाश करणार नाहीं व जो करार तुझ्या पूर्वजांशीं त्यानें शपथपूर्वक केला तो विसरणार नाहीं. ३२ देवानें मानवास निर्माण करून या पृथ्वीवर ठेविलें तेव्हांपासून तुझ्या जन्मापर्यंत आकाशाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत जे दिवस गेले त्यांस विचारून पाहा कीं कधीं अशी मोठी गोष्ट झाली काय किंवा ऐकण्यांत तरी आली काय? ३३ देवाची वाणी अग्नीमधून प्रगट झाली ती तूं ऐकली तशी ऐकून दुसरे कोणी लोक जीवंत राहिले काय? ३४ त्याप्रमाणेंच तुमचा देव परमेश्वर यानें मिसर देशांतून तुमच्यासाठीं तुम्हांदेखत परीक्षा, चिन्हें, चमत्कार, युद्धें, बलिष्ठ भुज आणि उगारिलेला हस्त यांच्या योगें जशीं भयप्रद कृत्यें केलीं तशीं करून कोणा देवानें एकाद्या राष्ट्रास इतर राष्ट्रांमधून बाहेर काढण्याचा कधीं यत्न केला काय? ३५ परमेश्वरच देव आहे व त्याच्याविरहित अन्य कोणी नाहीं असें तुला कळावें म्हणून हें सर्व तुला दाखविण्यांत आलें. ३६ तुला शिक्षण द्यावें म्हणून आकाशांतून त्यानें आपली वाणी तुला ऐकविली आणि पृथ्वीवर त्यानें तुला आपला महाग्नि दाखविला आणि अग्नीमधून निघालेलीं त्याचीं वचनें तूं ऐकलीं. ३७ त्यानें तुमच्या पूर्वजांवर प्रीति केली म्हणून त्यांच्यामागून त्यांच्या संतानास त्यानें निवडून घेतलें आणि त्यानें प्रत्यक्ष आपल्या महासामर्थ्यानें तुला मिसर देशांतून बाहेर आणिलें तें यासाठीं कीं, ३८ तुझ्याहून महान् व सामर्थ्यवान् राष्ट्रांस तुजपुढून घालवून देऊन तुला त्यांच्या देशांत न्यावें आणि त्यांची भूमि तुला वतन करून द्यावी; आज हें तुम्ही पाहतच आहां. ३९ याकरितां आज हें समजून घ्या आणि ध्यानांत ठेवा कीं वर आकाशांत व खालीं पृथ्वीवर परमेश्वरच देव आहे, अन्य कोणी नाहीं; ४० आणि त्याचे विधि व आज्ञा ज्या मी आज तुला सांगत आहें त्यांचें पालन कर, यासाठीं कीं तुझें व तुझ्यामागून तुझ्या वंशजांचें बरें व्हावें, आणि तुझा देव परमेश्वर जो देश तुला निरंतरचा देत आहे त्यांत तूं चिरकाळ राहावें.

४१ मग मोशानें यार्देनेच्या पलीकडे पूर्वेस, उगवतीकडे तीन नगरें वेगळीं केलीं, ४२ यासाठीं कीं चुकून व पूर्वी कांहीं वैर नसतां कोणीं आपल्या एकाद्या बांधवास मारिलें तर त्यानें यांतल्या एकाद्या नगरांत पळून जाऊन आपला जीव वांचवावा; ४३ तीं नगरें हीं: रऊबेन्यांचें रानांतील माळावरलें बेसेर, गाद्यांचें गिलादांतील रामोथ व मनश्शाचें बाशानांतलें गोलान.

४४ मोशानें इस्राएल लोकांस नियमशास्त्र लावून दिलें तें हें; ४५ इस्राएल लोक मिसर देशांतून निघाले तेव्हां त्यांस मोशानें सांगितलेलीं आज्ञावचनें, विधि व नियम हेच; ४६ यार्देनेच्या पलीकडे बेथपौराच्या समोरील खोऱ्यांत हेशबोननिवासी अमोऱ्यांचा राजा सीहोन, ज्याला मिसर देशांतून बाहेर निघून आल्यावर मोशे आणि इस्राएल लोक यांनीं जिंकें मारिलें, त्याच्या देशीं असतां हें सांगण्यांत आलें; ४७ आणि त्यांचा

देश व बाशानाचा राजा ओग याचा देश त्यांनीं
काबीज केला; यार्देनेच्या पलीकडे उगवतीस राहणारे
अमोरी यांच्या दोन राजांचा हा देश. ४८ हा
देश म्हटला म्हणजे आर्णोन खोऱ्याच्या सीमेवरल्या
अरोएर नगरापासून सीयोन म्हणजे हर्मोन पर्वता-
पर्यंत; ४९ आणि पिसग्याच्या उतरणीखालीं अराबाच्या
समुद्रापर्यंत यार्देनेच्या पलीकडील पूर्वेचा सर्व अराबा
हा होय.

५ १ मोशानें सर्व इस्राएल लोकांस बोलावून सांगि-
तलें, हे इस्राएल लोकहो, जे विधि व नियम आज
मी तुमच्या कानीं पाडीत आहें ते ऐकून घ्या; तुम्ही ते
शिका, मान्य करा व पाळा. २ आपला देव परमेश्वर
यानें होरेबांत आपणांबरोबर करार केला. ३ हा करार
परमेश्वरानें आपल्या पूर्वजांशींच केला असें नव्हे, तर
आज जे आपण सर्व जीवंत आहों त्या आपल्याबरोबर
केला आहे. ४ परमेश्वरानें त्या पर्वतावर अग्नीमधून
तुम्हांशीं प्रत्यक्ष भाषण केलें; ५ त्या अग्नीच्या
भीतीनें तुम्ही पर्वतावर चढलां नाहीं; परमेश्वराचें
वचन तुम्हांस प्रगट करावें म्हणून त्या प्रसंगीं मी
परमेश्वराच्या व तुमच्या दरम्यान उभा राहिलों;
तेव्हां त्यानें म्हटलें,

६ ज्यानें तुला मिसर देशांतून, दास्यगृहांतून
काढिलें तो मी परमेश्वर तुझा देव आहें.

७ माझ्यासमोर तुला अन्य देव नसावे.

८ आपल्यासाठीं कोरींव मूर्ति करूं नको; आकाशां-
तील, खालीं पृथ्वीवरील व पृथ्वीखालच्या जलांतील
कशाचीहि प्रतिमा करूं नको; ९ त्यांच्या पायां पडूं
नको किंवा त्यांची पूजा करूं नको; मी परमेश्वर तुझा
देव ईर्ष्यावान् देव आहें; जे मजशीं विरोध करितात
त्यांच्या मुलांस तिसऱ्या चौथ्या पिढीपर्यंत वडिलांच्या
अन्यायांबद्दल मी शासन करितों; १० आणि जे मजवर
प्रेम करितात व माझ्या आज्ञा पाळितात अशांच्या
हजारों[1] जणांवर मी करुणा करितों.

११ तुझा देव परमेश्वर याचें नांव व्यर्थ घेऊं नको;
कारण जो परमेश्वराचें नाम व्यर्थ घेईल त्याची तो गय
करणार नाहीं.

१२ तुझा देव परमेश्वर यानें तुला आज्ञा केल्या-
प्रमाणें शब्बाथ दिवस पवित्रपणें पाळण्याकडे लक्ष असूं दे.
१३ सहा दिवस श्रम करून आपलें सर्व कामकाज
कर; १४ पण सातवा दिवस तुझा देव परमेश्वर याचा
शब्बाथ आहे; त्या दिवशीं कोणतेंहि कामकाज करूं
नये; तूं, तुझा पुत्र, तुझी कन्या, तुझा दास, तुझी
दासी, तुझा बैल, तुझें गाढव, तुझा कोणताहि पशु
अथवा तुझ्या वेशींच्या आंत असलेला विदेशी यानेंहि
तें करूं नये; यासाठीं कीं तुझ्याप्रमाणें तुझ्या दास-
दासींसहि विश्राम मिळावा. १५ तूं हया गोष्टीचें स्मरण
ठेव कीं मिसर देशांत तूं दास होतास आणि तेथून तुझा
देव परमेश्वर यानें तुला बलिष्ठ भुजानें व उगारलेल्या
हातानें बाहेर आणिलें, म्हणून तुझा देव परमेश्वर यानें
तुला शब्बाथ दिवस पाळण्याची आज्ञा केली आहे.

१६ तुझा देव परमेश्वर यानें तुला आज्ञा केली
आहे तदनुसार आपला बाप व आपली आई यांचा
मान राख म्हणजे जो देश तुझा देव परमेश्वर तुला
देणार आहे त्यांत तूं चिरकाल राहशील आणि तुझें
कल्याण होईल.

१७ खून करूं नको.

१८ व्यभिचार करूं नको.

१९ चोरी करूं नको.

२० आपल्या शेजाऱ्याविरुद्ध खोटी साक्ष देऊं नको.

२१ आपल्या शेजाऱ्याच्या स्त्रीचा अभिलाष करूं
नको; आपल्या शेजाऱ्याच्या घराची लालसा धरूं नको;
त्याचें शेत, दास, दासी, बैल, गाढव, अथवा आपल्या
शेजाऱ्याची कोणतीहि वस्तु यांची लालसा धरूं नको.

२२ हीं वचनें परमेश्वरानें त्या पर्वतावर अग्नि-
मेघ व अंधकार यांमधून तुमच्या सर्व मंडळीस महा-
शब्देंकरून सांगितलीं; अधिक सांगितलीं नाहींत.
त्यानें दोन दगडी पाट्यांवर तीं लिहून माझ्या हातीं दिलीं.
२३ पर्वत अग्नीनें जळत असतां त्या काळोखांतून

१ अथवा : पिढ्यांवर

निघत असलेला त्याचा शब्द तुम्हीं ऐकला, तेव्हां तुम्ही व तुमच्या वंशांचे सर्व प्रमुख व तुमचे वडील जन माझ्यासन्निध आले; २४ त्या समयीं तुम्ही म्हणालां, पाहा, आमचा देव परमेश्वर यानें आम्हांस आपलें तेज व महिमा प्रगट केला आहे, आणि अग्नीमधून निघत असलेला त्याचा शब्द आम्हीं ऐकला आहे; तर आज आम्हीं हें पाहिलें कीं देव मानवाशीं बोलत असतांहि मानव जीवंत राहतो. २५ आतां आम्हीं कां प्राणास मुकावें? कारण हा प्रचंड अग्नि आम्हांस भस्म करील; आम्ही आमचा देव परमेश्वर याची वाणी आणखी ऐकत राहूं तर मरून जाऊं. २६ तरी आम्ही अग्नीमधून निघणारी जीवंत देवाची वाणी ऐकून जीवंत राहिलों, तसा प्राणिमात्रांपैकीं दुसरा कोणी जीवंत राहिला आहे काय? २७ तर तूं समीप जा आणि जें कांहीं आमचा देव परमेश्वर बोलेल तें ऐकून घे; आणि मग जें कांहीं आमचा देव परमेश्वर तुला सांगेल तें आम्हांस सांग म्हणजे आम्ही तें ऐकून त्याप्रमाणें वागूं. २८ तुम्हीं मला असें सांगितलें तेव्हां परमेश्वरानें तुमचें म्हणणें ऐकलें; आणि तो मला म्हणाला, या लोकांचें तुजशीं जें कांहीं बोलणें झालें तें मीं ऐकलें आहे; त्यांनीं जें कांहीं म्हटलें तें बरोबर म्हटलें; २९ त्यांचें मन निरंतर असेंच राहिलें तर किती बरें! म्हणजे ते माझें भय धरून माझ्या सर्व आज्ञांचें सर्वदा पालन करितील, व तशानें त्यांचें व त्यांच्या संततीचें निरंतर कल्याण होईल. ३० त्यांस जाऊन सांग कीं तुम्ही आपआपल्या डेऱ्यांकडे परत जा; ३१ पण तूं येथें माझ्याजवळ उभा राहा आणि सर्व धर्मशास्त्र, विधि व नियम तुला त्यांस शिकवावयाचे आहेत ते मी तुला सांगेन, यासाठीं कीं जो देश मी त्यांस वतन करून देत आहें, त्यांत त्यांनीं ते पाळावे. ३२ म्हणून तुम्ही आपला देव परमेश्वर याच्या आज्ञा मान्य करून पाळा, उजवीडावीकडे वळूं नका. ३३ ज्या मार्गानें चालण्याविषयीं तुमचा देव परमेश्वर यानें तुम्हांस आज्ञा दिली आहे त्या सर्व मार्गानें तुम्ही चाला म्हणजे तुम्ही जीवंत राहाल व तुमचें कल्याण होईल; आणि जो देश तुम्ही वतन करून घेणार आहां त्यांत तुम्ही चिरकाल राहाल.

६ १ तुमचा देव परमेश्वर यानें धर्मशास्त्र, विधि व नियम तुम्हांस शिकविण्याची आज्ञा मला दिली आहे; तुम्ही जो देश वतन करून घेण्यास पैलतीरीं जात आहां तेथें तुम्हीं ते पाळावे; ते हे: २ तूं व तुझे पुत्रपौत्र यांनीं परमेश्वराचें भय बाळगून सर्व विधि व आज्ञा ज्या मी तुला सांगत आहें त्या जन्मभर पाळाव्या म्हणजे तूं तेथें चिरकाळ राहशील. ३ ह्याकरितां हे इस्राएला, हें श्रवण कर, मान्य कर आणि पाळ म्हणजे तुझें कल्याण होईल; आणि तुझ्या पूर्वजांचा देव परमेश्वर यानें दुधामधाचे प्रवाह वाहत असलेला जो देश तुला देण्याचें वचन दिलें आहे त्यांत तुम्ही बहुगुणित व्हाल.

४ हे इस्राएला, श्रवण कर; आपला देव परमेश्वर हा अनन्य परमेश्वर आहे; ५ तूं आपला देव परमेश्वर याजवर पूर्ण मनानें, पूर्ण जिवानें व पूर्ण शक्तीनें प्रीति कर. ६ ज्या गोष्टी मी तुला आज बजावून सांगत आहें त्या तुझ्या हृदयांत बिंबीव; ७ आणि त्या तूं आपल्या मुलांबाळांच्या मनांवर ठशीव आणि घरीं असतां, मार्गानें चालत असतां, निजतां, उठतां त्यांविषयीं बोलत जा. ८ त्या आपल्या हाताला चिन्नादाखल बांध आणि आपल्या दोन्ही डोळ्यांच्या मधल्या भागीं कपाळपट्टी म्हणून लाव. ९ आपल्या दाराच्या बाह्यांवर व आपल्या फाटकांवर त्या लिही.

१० जो देश तुला देण्याविषयीं तुझा देव परमेश्वर यानें अब्राहाम, इसहाक व याकोब यांस आणभाक दिली आहे तेथें तो तुम्हांस घेऊन जाईल; जीं मोठीं व सुंदर नगरें तुम्हीं स्वतः वसविलीं नाहींत तीं तो तुम्हांस देईल. ११ तूं भरिलीं नाहींत अशा उत्तम वस्तूंनीं भरलेलीं घरें, तूं खोदिल्या नाहींत अशा खोदिलेल्या विहिरी आणि तूं लाविले नाहींत असे द्राक्षमळे व जैतूनवृक्ष हीं सर्व तो तुला देईल; आणि तूं त्यांचा उपभोग घेऊन तृप्त होशील. १२ मात्र ज्या परमेश्वरानें तुला दास्यगृहांतून, मिसर देशांतून काढिलें

त्याचा तुला विसर पडेल असें न होवो. १३ तूं
आपला देव परमेश्वर याचें भय बाळग, त्याची
उपासना कर, आणि शपथ वाहतांना त्याचेंच नाम घे.
१४ तुम्ही अन्य देवांच्या म्हणजे आपणांसभोंवतालच्या
देशांतील लोकांच्या देवांमागें लागूं नका; १५ कारण
तुझ्यामध्यें असणारा तुझा देव परमेश्वर ईर्ष्यावान्
देव आहे. तुझा देव परमेश्वर याचा कोप तुझ्यावर
भडकून त्यानें तुझा संहार करून तुला पृथ्वीवरून
नष्ट करावें असें न होवो.

१६ तुमचा देव परमेश्वर याची परीक्षा तुम्हीं मस्सा एथें
पाहिली तशी पाहूं नका. १७ आपला देव परमेश्वर यानें
दिलेल्या आज्ञा, आज्ञावचनें व विधि हीं जपून पाळा.
१८ जें काम परमेश्वराच्या दृष्टीनें उचित व चांगलें
आहे तेंच कर, म्हणजे तुझें कल्याण होईल; आणि
जो उत्तम देश देण्याची परमेश्वरानें तुझ्या पूर्वजांस
आणभाक दिली आहे त्यांत तुझा प्रवेश होऊन त्याचें
वतन तूं पावशील; १९ आणि परमेश्वराच्या सांगण्या-
प्रमाणें तुझे सर्व शत्रु तुझ्यापुढून घालवून देण्यांत येतील.

२० पुढील काळीं जेव्हां तुझा पुत्र तुला विचारील
कीं हीं आज्ञावचनें, हे विधि व हे नियम पाळण्या-
विषयीं आपला देव परमेश्वर यानें तुम्हांस आज्ञा
दिली आहे त्यांचें प्रयोजन काय? २१ तेव्हां तूं
आपल्या पुत्रांस सांग कीं आम्हीं मिसर देशांत फारोचे
दास होतों तेव्हां परमेश्वरानें समर्थ हातानें आम्हांस
मिसर देशांतून बाहेर काढिलें; २२ परमेश्वरानें आमच्या-
देखत मिसर देशांत फारो व त्याचें सर्व घराणें यांस
पीडादायक अशीं मोठीं चिन्हें व चमत्कार दाखविले;
२३ आणि आपल्या पूर्वजांस आणभाक करून दिलेल्या
या देशांत न्यावें म्हणून त्यानें तेथून आम्हांस
बाहेर काढिलें. २४ परमेश्वरानें हे सर्व विधि
पाळण्याची आपल्याला आज्ञा दिली, ती यासाठीं कीं
आपण आपला देव परमेश्वर याचें भय बाळगावें;
अशानें आपलें निरंतरचें कल्याण होईल आणि तो
आपणांस जीवंत राखील; आज हें तुम्ही पाहतच आहां.
२५ आपण आपला देव परमेश्वर याच्यासमोर
त्याच्या आज्ञेप्रमाणें हे सर्व नियम मान्य करून पाळिले
तरी ही आपली धार्मिकता ठरेल.

१ जो देश वतन करून घेण्यास तूं जात आहेस
७ तेथें तुझा देव परमेश्वर तुला नेईल आणि तुझ्या-
पुढून बहुत राष्ट्रें घालवून देईल, म्हणजे अर्थात्
हित्ती, गिर्गाशी, अमोरी, कनानी, परिज्जी, हिव्वी
आणि यबूसी हीं तुम्हांहून महान् आणि समर्थ अशीं
सात राष्ट्रें घालवून देईल; २ आणि तुझा देव परमेश्वर
त्यांस तुझ्या हवालीं करील व तूं त्यांचा मोड करिशील,
तेव्हां त्यांचा समूळ नाश कर; त्यांशीं करारमदार
करूं नको व त्यांची दया करूं नको; ३ त्यांच्याशीं
सोयरीक करूं नको; आपली कन्या त्यांच्या मुलास
देऊं नको व त्यांची कन्या आपल्या मुलास करूं नको;
४ कारण ते लोक तुझ्या पुत्रास मजपासून बहकवितील
आणि अन्य देवांची उपासना करावयास लावितील;
त्यामुळें परमेश्वराचा कोप तुम्हांवर भडकेल व तो
तुमचा नाश सत्वर करील. ५ त्या लोकांशीं वर्तन
करावयाचें तें असें: त्यांच्या वेद्या मोडून टाका, त्यांचे
स्तंभ तोडून टाका, त्यांच्या अशेरा मूर्ति तोडून फोडून
टाका आणि त्यांच्या कोरींव मूर्ति अग्नीनें जाळून टाका.
६ कारण तूं आपला देव परमेश्वर याची पवित्र प्रजा
आहेस; या अखिल पृथ्वीवरील देशांतील लोकांतून
तुझा देव परमेश्वर यानें तुला निवडून घेतलें आहे
तें यासाठीं कीं तूं त्याची खास प्रजा व्हावें. ७ परमे-
श्वरानें तुम्हांवर प्रेम करून तुम्हांस निवडिलें याचें
कारण तुम्ही संख्येनें बहुत म्हणून नव्हे; उलट तुम्ही
सर्व राष्ट्रांमध्यें संख्येनें अल्प होतां; ८ परमेश्वरानें
तुम्हांस समर्थ हातानें दास्यगृहांतून, मिसरचा राजा फारो
याच्या हातांतून सोडवून बाहेर आणिलें याचें कारण
हेंच कीं त्याचें तुमच्यावर प्रेम आहे आणि तुमच्या
पूर्वजांशीं जी आणभाक त्यानें केली ती पुरी करण्याची
त्याची इच्छा आहे. ९ याकरितां हें पक्कें समजून घे
कीं तुझा देव परमेश्वरच देव आहे, तो सत्यवचनी
देव आहे; जे त्याजवर प्रेम ठेवितात व त्याच्या आज्ञा
पाळितात त्यांच्या हजारों पिढ्यांबरोबर तो आपला करार

पाळून त्यांजवर दया करितो; १० जे त्याचें वैर करितात त्यांच्या डोळ्यांदेखत तो त्यांचें पारिपत्य करून नाश करितो; जो त्याचें वैर करितो त्याच्यासंबंधानें विलंब न करितां त्याच्या डोळ्यांदेखत तो त्याचें पारिपत्य करितो. ११ यास्तव जें धर्मशास्त्र, जे विधि व जे नियम मी आज तुम्हांस सांगत आहें ते मान्य करून पाळा.

१२ तुम्हीं हे नियम ऐकून मान्य केले व त्याप्रमाणें चालला तर तुझा देव परमेश्वर तुझ्या पूर्वजांशीं शपथपूर्वक केलेला करार व दयेचें वचन तुझ्यासंबंधानें राखील; १३ तो तुजवर प्रेम ठेवील, तुझें अभीष्ट करील, तुला बहुगुणित करील आणि जो देश तुला देण्याविषयीं तुझ्या पूर्वजांशीं त्यानें आणभाक केली त्या देशीं तो तुझें पोटचें फळ, धान्य, द्राक्षारस व तेल ह्या तुझ्या भूमीचा उपज आणि तुझ्या गुरांढोरांची व शेरडांमेंढरांची वाढ यांसंबंधानें तुला बरकत देईल. १४ तूं सर्व देशच्या लोकांहून धन्य होशील; तुझ्यांतला किंवा तुझ्या पशूंतला कोणी नर किंवा मादी वांझ राहणार नाहीं; १५ आणि परमेश्वर तुजपासून सर्व प्रकारचे रोग दूर राखील. मिसर देशांतील ज्या व्याधि तुला ठाऊक आहेत, त्यांतल्या कोणत्याहि तुला लागणार नाहींत; त्या तुझ्या सर्व वैऱ्यांस लागतील. १६ जे लोक तुझा देव परमेश्वर तुझ्या हातीं देईल त्यांचा संहार कर; त्यांजवर दयादृष्टि करूं नको; त्यांच्या देवांची उपासना करूं नको; करिशील तर तो तुला पाश होईल. १७ तूं एखादे वेळीं आपल्या मनांत असा विचार आणिशील कीं हीं राष्ट्रें मजहून मोठीं आहेत, त्यांस त्यांच्या वतनांतून मला कसें घालवून देतां येईल ? १८ तर त्यांची भीति धरूं नको; तुझा देव परमेश्वर यानें फारोचें व सर्व मिसर देशाचें काय केलें त्याचें चांगलें स्मरण ठेव; १९ तूं आपल्या डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेलीं संकटें, चिन्हें व चमत्कार, तसेंच समर्थ भुज व उगारिलेला हात यांच्यायोगें तुझा देव परमेश्वर यानें तुला काढून आणिलें याचें चांगलें स्मरण ठेव; त्याप्रमाणेंच ज्या लोकांची तुला भीति वाटत आहे त्यांचें शासन तुझा देव परमेश्वर करील. २० याखेरीज तुझा देव परमेश्वर त्यांच्यामध्यें गांधीलमाशा पाठवील, त्या एवढ्या कीं त्यांच्यापैकीं जे तुझ्यापुढून वांचून लपून राहतील त्यांचाहि नाश होईल. २१ त्यांस पाहून घाबरूं नको, कारण तुझा देव परमेश्वर तुझ्यामध्यें आहे; तो महान् आणि भययोग्य देव आहे. २२ तुझा देव परमेश्वर त्या राष्ट्रांस तुझ्यापुढून हळूहळू घालवील; त्यांचा एकदम अंत करूं नको, केल्यास वनपशु वाढून तुला उपद्रव होईल. २३ तरी तुझा देव परमेश्वर त्यांस तुझ्या हातीं देईल आणि त्यांचा निःपात होईपर्यंत त्यांस व्याकुळ करीत राहील. २४ तो त्यांचे राजे तुझ्या हातीं देईल आणि तूं त्यांचें नांव या नभोमंडळाखालून नष्ट करिशील; त्यांतला कोणीहि तुजशीं सामना करणार नाहीं; व शेवटीं तूं त्यांचा संहार करिशील. २५ त्यांच्या देवांच्या कोरींव मूर्ति तुम्ही अग्नीनें जाळून टाका; त्यांजवरली रुप्याची व सोन्याची मढणी असेल तिचा लोभ करूं नको व ती आपल्याकरितां घेऊं नको; घेशील तर त्यांच्यामुळें पाशांत पडशील; कारण तुझा देव परमेश्वर याला त्याचा वीट आहे; २६ तूं कोणतीहि अमंगळ वस्तु आपल्या घरीं आणूं नको, आणिशील तर तूंहि तिच्याप्रमाणें नाशपात्र ठरशील; तिचा अगदीं वीट मान व तिचा अव्हेर कर, कारण ती नाशपात्र वस्तु आहे.

८ १ जें सर्व धर्मशास्त्र आज मी तुम्हांला विहित करीत आहें तें मान्य करून पाळा, म्हणजे तुम्ही जगाल, बहुगुणित व्हाल आणि तुमच्या पूर्वजांस परमेश्वरानें शपथपूर्वक देऊं केलेल्या देशांत प्रवेश करून तो वतन करून घ्याल. २ तुझा देव परमेश्वर हीं चाळीस वर्षें रानांतून तुला कोणत्या रीतीनें घेऊन आला याची आठवण ठेव; तुला लीन करावें आणि तुझ्या मनांत काय काय आहे व तूं त्याच्या आज्ञा पाळिशील कीं नाहीं याची कसोटी पाहावी म्हणून. ३ त्यानें तुला लीन केलें, तुला उपासमार होऊं दिली, तेव्हां तुला किंवा तुझ्या पूर्वजांस ठाऊक नसलेला जो मान्ना त्याच्या योगानें त्यानें तुझें पोषण केलें; तें यासाठीं कीं मनुष्य

केवळ भाकरीनें नव्हे तर परमेश्वराच्या मुखांतून निघ-
णाऱ्या प्रत्येक वचनानें वांचेल हें तुझ्या प्रत्ययास आणून
द्यावें. ४ हीं चाळीस वर्षे तुझीं वस्त्रें जीर्ण झालीं नाहींत,
तुझे पाय सुजले नाहींत. ५ तूं आपल्या मनांत हा
विचार कर कीं मनुष्य आपल्या पुत्रास ताडण करितो
तसा तुझा देव परमेश्वर तुला ताडण करीत आहे.
६ तर आपला देव परमेश्वर याच्या आज्ञा पाळ,
त्याच्या मार्गानें चाल व त्याचें भय बाळग. ७ कारण
तुझा देव परमेश्वर तुला एका उत्तम देशीं घेऊन जात
आहे; खोऱ्यांत व डोंगरांत उगम पावून पाण्यानें भरलेल्या
नद्या, झरे, ओहोळ त्यांत वाहत आहेत; ८ गहूं,
जव, द्राक्षवेली, अंजीर व डाळिंबें यांचा तो देश आहे,
मध व तेल देणारे जैतून यांचा तो देश आहे; ९ त्या
देशांत टंचाई न पडतां तूं अन्न खाशील; तुला कोणत्याहि
गोष्टीची वाण पडणार नाहीं; तेथले धोंडे लोखंड
आहेत व तेथल्या पहाडांतून तुला तांबें खणून काढतां
येईल. १० तूं खाऊनपिऊन तृप्त होशील आणि जो
उत्तम देश तुझा देव परमेश्वर यानें तुला दिला आहे
त्याबद्दल तूं त्याचा धन्यवाद करिशील. ११ आपला
देव परमेश्वर याला तूं विसरूं नयें; ज्या आज्ञा, नियम व
विधि मी आज तुला सांगत आहें त्या पाळावयाचें
सोडून देशील तर संभाळ. १२ तूं खाऊनपिऊन तृप्त
होशील आणि चांगलीं घरें बांधून त्यांत राहशील,
१३ तुझीं गुरेंढोरें व शेरडेंमेंढरें यांची वृद्धि होईल,
तुझें सोनेंरुपें व तुझी सर्व मालमत्ता वाढेल, १४ तेव्हां
तुझें मन उन्मत्त होऊन ज्यानें तुला दास्यगृहांतून,
मिसर देशांतून काढून आणिलें तो तुझा देव परमेश्वर
याला विसरूं नये म्हणून संभाळ; १५ आग्या सर्पांनीं
व विंचवांनीं व्यापिलेल्या विस्तीर्ण व भयानक रानांतून
आणि पाणी नसलेल्या रुक्ष भूमींतून त्यानें तुला आणिलें;
त्यानें तुजसाठीं गारगोटीच्या खडकांतून पाणी काढिलें;
१६ आणि तुझ्या पूर्वजांस माहीत नसलेला जो मान्ना
त्याच्या योगानें रानांत त्यानें तुझें पोषण केलें, तें यासाठीं
कीं तुला लीन करावें व कसोटीस लावून अखेरीस
तुझें कल्याण करावें; १७ तसेंच हें धन माझ्याच
सामर्थ्यानें व भुजबलानें मला प्राप्त झालें आहे असें तूं
मनांत म्हणूं नको. १८ तूं आपला देव परमेश्वर
याचें स्मरण ठेव, कारण धनप्राप्ति करून घेण्याचें
सामर्थ्य तोच तुला यासाठीं देत आहे कीं त्यानें तुझ्या
पूर्वजांशीं शपथपूर्वक केलेला करार कायम राखावा;
आज हें विदितच आहे. १९ तूं आपला देव परमेश्वर
यास विसरून इतर देवांच्या मागें लागशील, त्यांची
उपासना करिशील, त्यांचें भजनपूजन करिशील तर
तुमचा समूळ नाश होईल; हें मी तुम्हांला प्रतिज्ञापूर्वक
सांगतों. २० तुम्ही आपला देव परमेश्वर याची वाणी
ऐकणार नाहीं तर ज्या राष्ट्रांचा नाश परमेश्वर तुमच्या-
देखत करणार आहे त्यांच्याप्रमाणें तुम्हीहि नाश पावाल.

९ १ हे इस्राएला, श्रवण कर; तुझ्याहून महान
व समर्थ राष्ट्रें ताब्यांत घेण्यास तूं आज यार्देन
उतरून जाणार आहेस; त्यांचीं नगरें मोठीं व
त्यांचे कोट गगनचुंबित आहेत; २ तेथले लोक मोठे
व धिप्पाड असून अनाकी वंशांतले आहेत हें तुला
माहीतच आहे; अनाकाच्या वंशजांशीं कोण सामना
करील? हा त्यांजविषयींचा प्रवाद तूं ऐकलाच आहे.
३ तर आतां हें पक्कें जाण कीं भस्म करणाऱ्या अग्नी-
सारखा तुझ्यापुढें तुझा देव परमेश्वर आहे; तो त्यांचा
संहार करील व त्यांला तुझ्यापुढें चीत करील, आणि
परमेश्वरानें तुला सांगितल्याप्रमाणें तूं त्यांस घालवून
देऊन त्यांचा त्वरित नाश करिशील. ४ तुझा देव
परमेश्वर त्यांस तुझ्यापुढून घालवून देईल तेव्हां आपल्या
मनांत म्हणूं नको कीं माझ्या पुण्याईमुळें परमेश्वरानें
मला हा देश वतन करून घेण्यास येथें आणिलें आहे;
खरें पाहतां या राष्ट्रांच्या दुष्टाईमुळें तुझा देव परमेश्वर
त्यांस तुझ्यासमोरून घालवून देत आहे. ५ तूं त्यांचा
देश वतन करून घेण्यास जात आहेस हें तुझ्या पुण्याई-
मुळें नव्हे अथवा तुझ्या मनाच्या सात्विकतेमुळें
नव्हे, तर त्या राष्ट्रांच्या दुष्टाईमुळें; आणि तुझे पूर्वज
अब्राहाम, इसहाक व याकोब यांजशीं परमेश्वरानें जी
आणभाक केली ती खरी करावी म्हणून तो तुझा
देव परमेश्वर त्या राष्ट्रांस तुझ्यापुढून घालवून देत

आहे. ६ तर हें पक्कें जाण कीं, तुझ्या पुण्याईमुळें हा
उत्तम देश तुझा देव परमेश्वर तुला वतन करून देत
आहे असें नाहीं; कारण तूं ताठ मानेची जात आहेस.
७ रानांत तूं आपला देव परमेश्वर यास चिडवून
क्रोधाविष्ट केलें याची आठवण ठेव, तें विसरूं नको;
मिसर देशांतून तूं बाहेर निघालास तेव्हांपासून या
स्थानीं येऊन पोहंचपर्यंत तुम्ही परमेश्वराशीं फितुरीच
करीत आलां आहां. ८ तसेंच होरेबांतहि तुम्हीं परमे-
श्वरास चेतवून संतप्त केलें; तो इतका क्रोधाविष्ट झाला
होता कीं तो तुमचा संहार करणार होता. ९ तेव्हां
परमेश्वरानें तुम्हांशीं केलेल्या कराराच्या दगडी पाट्या
घ्यावयासाठीं मी डोंगर चढून गेलों व तेथें अन्नपाण्या-
वांचून चाळीस दिवस व चाळीस रात्री राहिलों;
१० आणि परमेश्वरानें आपल्या बोटानें लिहिलेल्या
दोन दगडी पाट्या मला दिल्या, आणि मंडळी जमली
होती त्या दिवशीं जेवढीं वचनें परमेश्वरानें पर्वतावरील
अग्नींतून तुम्हांस सांगितलीं तेवढीं सर्व त्या पाट्यांवर
लिहिलीं होतीं. ११ चाळीस दिवस व चाळीस रात्री
लोटल्यावर परमेश्वरानें कराराच्या त्या दोन दगडी
पाट्या मला दिल्या. १२ तेव्हां परमेश्वर मला म्हणाला,
ऊठ, लवकर खालीं उतरून जा; कारण तुझ्या ज्या
लोकांस तूं मिसर देशांतून काढून आणिलें ते बिघडले
आहेत, आणि ज्या मार्गानें चालावयाची मीं त्यांस
आज्ञा दिली होती तो त्यांनीं लागलीच सोडून दिला
आहे; त्यांनीं एक ओतींव मूर्ति केली आहे.
१३ परमेश्वर आणखी मला म्हणाला, मीं या लोकांस
पाहून ठेविलें आहे; ही ताठ मानेची जात आहे;
१४ तर मला आडवा येऊं नको, मी त्यांचा संहार
करितों आणि नभोमंडळाखालून त्यांचें उच्चाटन करितों;
त्यांहून श्रेष्ठ असें तुझेंच एक महान् व समर्थ राष्ट्र
मी करितों. १५ तेव्हां मी मागें फिरून पर्वता-
वरून खालीं उतरत असतां पर्वत अग्नीनें जळत होता
आणि कराराच्या दोन पाट्या माझ्या दोन हातांत
होत्या. १६ मीं पाहिलें तों माझ्या दृष्टीस पडलें कीं
तुम्हीं आपला देव परमेश्वर याच्याविरुद्ध पाप केलें;
एक वासरूं ओतून तयार केलें व ज्या मार्गानें चालण्याचें
परमेश्वरानें तुम्हांस आज्ञा दिली होती तो तुम्हीं
लागलीच सोडून दिला. १७ तेव्हां त्या दोन पाट्या
धरून मीं हातांतून फेकून देऊन तुमच्यादेखत
फोडिल्या. १८ तुम्हीं परमेश्वराच्या दृष्टीनें दुष्कर्म
करून त्याला संताप आणिला हें तुम्हीं महापातक केलें
म्हणून मी परमेश्वरापुढें पालथा पडलों आणि पूर्वी-
प्रमाणें चाळीस दिवस व चाळीस रात्री मीं अन्नपाणी
सेवन केलें नाहीं. १९ तुमचा संहार करावा म्हणून
परमेश्वरास कोप व संताप चढला होता त्याचें
मला भीति वाटली; तथापि या खेपेसहि परमेश्वरानें
माझें ऐकलें. २० परमेश्वर अहरोनावर इतका संतापला
कीं तो त्याचा नाश करणार होता; त्या प्रसंगीं त्याच्या-
साठींहि मीं प्रार्थना केली. २१ मग मीं तुमचें पापकर्म
म्हणजे तुम्हीं केलेलें वासरूं घेऊन अग्नींत जाळिलें
त्याचे फोडून तुकडेतुकडे केले व वांटून धुळीइतकें
बारीक चूर्ण केलें व डोंगरावरून वाहणाऱ्या ओहळांत
तें फेकून दिलें. २२ नंतर तबेरा, मस्सा व
किब्रोथ-हत्तव्वा येथेंहि तुम्हीं परमेश्वरास संतप्त केलें.
२३ यावर परमेश्वरानें कादेश-बर्ण्याहून तुम्हांस रवाना
करून सांगितलें कीं जा, आणि जो देश मीं तुम्हांस दिला
आहे तो ताब्यांत घ्या; तेव्हांहि तुम्हीं आपला देव
परमेश्वर याच्या आज्ञेविरुद्ध फितुरी केली; तुम्हीं त्याजवर
विश्वास ठेविला नाहीं व त्याचें सांगणें ऐकलें नाहीं.
२४ तुमचा माझा परिचय झाला त्या दिवसापासून तुम्ही
परमेश्वराविरुद्ध फितुर करीत आलां आहां. २५ तुमचा
संहार करावयाचा असें परमेश्वरानें म्हटलें म्हणून
मी त्याच्यासमोर ते चाळीस दिवस व त्या चाळीस
रात्री पालथा पडलों. २६ मीं परमेश्वराची अशी प्रार्थना
केली कीं, हे प्रभो देवा, ही तुझी प्रजा, हें तुझें वतन
तूं आपल्या प्रतापानें सोडविलें आणि समर्थ हातानें
मिसरांतून काढून आणिलें त्याचा नाश करूं नको.
२७ तुझे सेवक अब्राहाम, इसहाक व याकोब यांची
आठवण कर आणि या लोकांचा हट्ट, दुष्टता व पाप
यांकडे लक्ष देऊं नको; २८ देशील तर ज्या देशांतून

तूं आम्हांस काढून आणिलें तेथले लोक म्हणतील कीं जो
देश त्यांस देण्याचें परमेश्वरानें वचन दिलें होतें तेथें
त्यांस त्याला नेतां आलें नाहीं आणि तो त्यांचा द्वेष
करीत होता म्हणून तो त्यांस रानामध्यें मारून
टाकण्यासाठीं घेऊन गेला. २९ ही तुझी प्रजा
आहे, हें तर तुझें वतन आहे, त्यांस तूं आपल्या
महासामर्थ्यानें व उगारिलेल्या हातानें काढून
आणिलें आहे.

१ त्या समयीं परमेश्वरानें मला सांगितलें,
१० पहिल्या पाट्यांसारख्या दोन दगडी पाट्या
घडीव आणि त्या घेऊन मजकडे पर्वतावर
ये; लाकडाचा एक कोशहि तयार कर. २ मग तूं
फोडून टाकिलेल्या पूर्वीच्या पाट्यांवर जीं वचनें
होतीं तीं मी त्या पाट्यांवर लिहीन; त्या तूं
कोशांत ठेव. ३ त्याप्रमाणें मीं बाभळीच्या लाकडाचा
एक कोश बनविला, आणि पहिल्या पाट्यांसारख्या
दोन दगडी पाट्या घडवून हातीं घेऊन पर्वतावर
गेलों. ४ मंडळी जमली होती त्या दिवशीं जीं
दहा वचनें परमेश्वरानें पर्वतावर अग्नींतून तुम्हांस
सांगितलीं होतीं तींच वचनें त्यानें पहिल्याप्रमाणें या
पाट्यांवर लिहिलीं आणि माझ्या स्वाधीन केलीं. ५ मग
मी मागें परतून पर्वतावरून खालीं उतरलों आणि त्या
पाट्या मीं बनविलेल्या कोशांत ठेविल्या; परमेश्वराच्या
आज्ञेप्रमाणें त्या अजून त्यांत आहेत. ६ (इस्राएल लोक
बने-याकानाच्या विहिरींपासून कूच करून मोसेरास
आले तेव्हां तेथें अहरोन मृत्यु पावला व त्यास मूठ-
माती दिली, आणि त्याचा पुत्र एलाजार त्याच्या
जागीं याजकाचें काम करूं लागला. ७ तेथून कूच
करून गुदगोदा येथें ते आले, तेथून ते याटबाथा
येथें आले; येथें पाण्याचे पुष्कळ ओहोळ आहेत.
८ त्या समयीं परमेश्वरानें लेवी वंशास वेगळें केलें, तें
यासाठीं कीं त्यांनीं परमेश्वराच्या कराराचा कोश
वहावा, परमेश्वरासमोर उभे राहून त्याची सेवा करावी
व त्याच्या नामानें आशीर्वाद द्यावा; हें आजवर तसेंच
आहे. ९ ह्यामुळेंच लेव्यास त्याच्या भाऊबंदांबरोबर
कांहीं वांटा किंवा वतन नाहीं; तुझा देव परमेश्वर
यानें त्यास सांगितल्याप्रमाणें परमेश्वरच त्याचें वतन
आहे.) १० मी पहिल्याप्रमाणेंच चाळीस दिवस व
चाळीस रात्री पर्वतावर राहिलों; आणि या खेपेसहि
परमेश्वरानें माझें ऐकलें आणि तुमचा संहार करावयाचें
सोडून दिलें. ११ परमेश्वरानें मला सांगितलें, तूं या
लोकांचा पुढारी हो, म्हणजे जो देश देण्याविषयीं
त्यांच्या पूर्वजांशीं मीं आणभाक केली आहे तेथें ते
जाऊन त्याचा ताबा घेतील.

१२ तर आतां, हे इस्राएला, तुझा देव परमेश्वर
तुझ्यापाशीं जें मागतो तें एवढेंच कीं तूं आपला देव
परमेश्वर याचें भय बाळगून त्याच्या सर्व मार्गांनीं
चालावें, त्याजवर प्रेम ठेवावें व त्याची सेवा अगदीं
जिवेंभावें करावी, १३ परमेश्वराच्या आज्ञा व विधि
आज मी तुला तुझ्या बऱ्याकरितां सांगत आहें, ते
पाळावे. १४ पाहा, आकाश व आकाशापलीकडलें
आकाश आणि पृथ्वी व त्यांत जें सर्व कांहीं आहे तें
तुझा देव परमेश्वर याचें आहे. १५ परमेश्वराला तुझे
पूर्वज आवडून त्यांजवर त्यानें प्रेम केलें, आणि त्यांच्या
मागून तुम्ही जे त्यांचे वंशज आहां त्या तुम्हांस सर्व
देशाच्या लोकांतून त्यानें निवडून घेतलें आहे; हें आज
विदितच आहे. १६ तर तुम्ही आपल्या हृदयाची
अग्रत्वचा कापून टाका आणि यापुढें ताठ मानेचे राहूं
नका. १७ कारण तुमचा देव परमेश्वर देवाधिदेव,
प्रभूंचा प्रभु, महान् देव, पराक्रमी व भययोग्य असून
कोणाचा पक्षपात करीत नाहीं किंवा लांच घेत नाहीं.
१८ तो अनाथ व विधवा यांचा न्याय करितो आणि
परदेशीयावर प्रीति करून त्यास अन्नवस्त्र देतो. १९ ह्या-
करितां तुम्ही परदेशीयावर प्रीति करावी; कारण तुम्हीसुद्धां
मिसर देशांत परदेशीय होतां, २० आपला देव परमेश्वर
याचें भय बाळग, त्याची सेवा कर, त्याला धरून राहा
आणि त्याच्याच नामाची शपथ वाहा. २१ तोच तुझें
स्तोत्र आहे, तोच तुझा देव आहे, त्यानें तुझ्यासाठीं
मोठीं व भयप्रद कामें केलीं आहेत, तीं सर्व तूं आपल्या
डोळ्यांनीं पाहिलीं आहेत. २२ तुझे पूर्वज मिसरांत

गेले तेव्हां ते सत्तर जण होते; पण आतां तुझा देव
परमेश्वर यानें तुझी संख्या आकाशांतील ताऱ्यांप्रमाणें
बहुगुणित केली आहे.

१ यास्तव तूं आपला देव परमेश्वर याजवर
११ प्रीति करावी आणि त्यानें तुला लावून दिलेली
व्यवस्था, त्याचे विधि, त्याचे नियम व त्याच्या
आज्ञा हीं नित्य पाळावीं. २ आज तुम्ही हें पक्कें
लक्षांत आणा; तुमच्या मुलांबाळांस मी हें सांगत
नाहीं; त्यांनीं तर हें कांहीं अनुभविलें नाहीं, पाहिलें
नाहीं; म्हणजे तुमचा देव परमेश्वर यानें काय शिक्षा
केली, त्यानें आपला महिमा, समर्थ हात व उगारिलेले
बाहु दाखवून, ३ मिसर देशाचा राजा फारो यास व
त्याच्या साऱ्या देशास काय काय चिन्हें व कृत्यें दाख-
विलीं, ४ त्यानें मिसरी सैन्याचे घोडे व रथ यांचें
काय केलें, ते तुमचा पाठलाग करीत असतां त्यांजवर
तांबड्या समुद्राच्या पाण्याचा लोट कसा आणिला व
त्यांचा नाश करून त्यांचा मागमूस आजपर्यंत कसा
उरूं दिला नाहीं; ५ आणि तुम्ही या ठिकाणीं येऊन
पोहोंचला तोंपर्यंत रानांत त्यानें तुम्हांस कायकाय केलें;
६ त्याप्रमाणेंच त्यानें रऊबेनी अलीयाबाचे पुत्र दाथान व
अबीराम यांचें काय केलें, म्हणजे अर्थात् पृथ्वीनें
आपलें तोंड पसरून त्यांचीं कुटुंबें, डेरे आणि त्यांचे
अनुचर यांसह त्यांस इस्राएल लोकांदेखत कसें गिळून
टाकिलें, या सर्व गोष्टी त्यांनीं पाहिल्या नाहींत; ७ पण
परमेश्वराचीं हीं सर्व महत्कृत्यें तुम्हीं आपल्या डोळ्यांनीं
पाहिलीं आहेत. ८ यास्तव जें धर्मशास्त्र मी आज
तुम्हांस सांगत आहें तें तुम्हीं पाळावें, म्हणजे तुम्ही
समर्थ होऊन जो देश वतन करून घेण्यासाठीं पैलतीरीं
जात आहां त्यांत तुम्ही प्रवेश करून तो आपल्या
ताब्यांत घ्याल; ९ आणि जो देश तुम्हांस व तुमच्या
वंशजांस देण्याविषयीं परमेश्वरानें तुमच्या पूर्वजांशीं
आणभाक केली आणि ज्यांत दुधामधाचे प्रवाह वाहत
आहेत त्यांत तुम्ही चिरकाळ राहाल. १० तुम्ही
जो देश वतन करून घेण्यास जात आहां तेथली भूमि
तुम्ही सोडून आलेल्या मिसर देशांतल्या भूमीसारखी
नाहीं; तेथें तुम्ही भाजीच्या मळ्याप्रमाणें बीं पेरून
पायांनीं जमीन भिजवीत होतां; ११ पण जो
देश ताब्यांत घेण्यासाठीं तुम्ही पैलतीरीं जात आहां
तो डोंगरखोऱ्यांचा देश असून आकाशांतील
पावसाला शोषून घेतो; १२ तुझा देव परमेश्वर त्या
देशाची काळजी वाहतो, वर्षाच्या आरंभापासून अखेर-
पर्यंत तुझा देव परमेश्वर याची नजर त्या देशावर
सदैव असते.

१३ मी ज्या आज्ञा आज तुम्हांस सांगत आहें त्या
तुम्ही चित्त देऊन ऐकाल आणि आपला देव परमेश्वर
याजवर प्रेम ठेवाल व त्याची सेवा जिवेंभावें करीत
राहाल, १४ तर मी तुमच्या देशावर आगोठीचा आणि
वळवाचा पाऊस योग्य समयीं पाठवीन, म्हणजे तुला
आपलें अन्न, द्राक्षारस व तेल यांचा सांठा करितां
येईल. १५ मी तुझ्या गुरांढोरांसाठीं मैदानांत गवत
उपजवीन व तुला पोटभर खावयास मिळेल. १६ यास्तव
तुम्ही सावध असा, नाहीं तर तुमचें चित्त भ्रांत
होऊन तुम्ही बहकून अन्य देवांची उपासना करूं
लागाल आणि त्यांचें भजनपूजन कराल; १७ तशानें
परमेश्वराचा कोप तुम्हांवर भडकून तो आकाशकपाटें
लावील, म्हणजे पाऊस पडणार नाहीं; आणि भूमि
आपला उपज देणार नाहीं; आणि जो उत्तम देश परमेश्वर
तुम्हांस देत आहे त्यांतून तुमचा त्वरित नायनाट
होईल. १८ यास्तव तुम्ही माझीं हीं वचनें आपल्या
ध्यानींमनीं सांठवून ठेवा, तीं चिन्हांदाखल आपल्या
हातांस बांधा आणि आपल्या डोळ्यांच्या मध्यभागीं
कपाळपट्टी म्हणून ठेवा. १९ तुम्ही घरीं असतां,
मार्गानें चालत असतां, निजतां, उठतां त्यांच्यासंबंधानें
बोलत जा, आणि आपल्या मुलांबाळांस तीं शिकवीत
जा. २० तीं आपल्या घराच्या दारांच्या बाहांवर
आणि फाटकांवर लिहून ठेवा; २१ म्हणजे जो देश
मी तुम्हांस देईन अशी आणभाक परमेश्वरानें तुमच्या
पूर्वजांशीं केली होती, त्यांत तुम्ही व तुमचीं मुलेंबाळें
पृथ्वीच्या वरील आकाशाप्रमाणें चिरायु होतील.
२२ तर ही जी आज्ञा मी तुम्हांस सांगत आहें ती

तुम्ही मान्य करून तत्परतेनें पाळाल, आपला देव परमेश्वर
याजवर प्रेम ठेवाल, त्याच्या सर्व मार्गांनीं चालाल
आणि त्यालाच धरून राहाल, २३ तर परमेश्वर हीं सर्व
राष्ट्रें तुमच्यापुढून घालवून देईल आणि तुमच्याहून
महान् व समर्थ राष्ट्रांस आपल्या ताब्यांत तुम्ही आणाल.
२४ ज्या ज्या स्थलीं तुमचें पाऊल पडेल तीं सर्व स्थलें
तुमचीं होतील; रानापासून, लबानोनापासून आणि फरात
महानदापासून पश्चिमसमुद्रापर्यंत तुमच्या देशाचा विस्तार
होईल. २५ तुमच्यापुढें कोणासहि उभे राहतां येणार
नाहीं; ज्या ज्या भूमीला तुमचें पाऊल लागेल तेथल्या
सर्व रहिवाश्यांच्या मनांत तुमचा देव परमेश्वर आपल्या
वचनानुसार तुम्हांविषयीं भीति व दहशत उत्पन्न करील.

२६ पाहा, आज तुम्हांपुढें अभीष्ट व अनिष्ट हीं
दोन्ही मी ठेवीत आहें; २७ म्हणजे तुमचा देव परमेश्वर
याच्या ज्या आज्ञा मी आज तुम्हांस सांगत आहें त्या
तुम्हीं पाळिल्या तर तुमचें अभीष्ट होईल; २८ पण
तुम्हीं आपला देव परमेश्वर याच्या आज्ञा पाळिल्या
नाहींत, आणि ज्या मार्गानें जाण्याची मी तुम्हांस आज्ञा
आज करीत आहें तो सोडून अपरिचित अशा अन्य
देवांच्या मागें तुम्ही गेलां तर तुमचें अनिष्ट होईल.

२९ जो देश ताब्यांत घेण्यास तूं जात आहेस तेथें
तुझा देव परमेश्वर तुला नेऊन पोंचवील तेव्हां तुम्हीं
गरिज्जीम डोंगरावरून आशीर्वाद आणि एबाल डोंगरा-
वरून शाप उच्चारावा. ३० यार्देनेपलीकडे मावळतीस
अराबांत राहणारे कनानी यांच्या प्रदेशांत गिल्गाला-
समोर, मोरेच्या एलोन वृक्षासमोर ते डोंगर आहेत ना ?
३१ तुम्ही यार्देन उतरून यासाठीं जात आहां कीं जो
देश तुमचा देव परमेश्वर तुम्हांस देत आहे त्याचें वतन
तुम्हांला मिळावें; तुम्ही तो ताब्यांत घ्याल व त्यांत
वस्ती कराल. ३२ ह्याकरितां जे विधि व नियम मी
आज तुम्हांला सांगत आहें ते सर्व मान्य करून पाळा.

१ जो देश तुमच्या पूर्वजांचा देव परमेश्वर
१२ यानें तुम्हांस वतन म्हणून देऊं केला आहे
त्यांत तुम्ही या भूलोकीं जीवंत राहाल तोंवर
हे विधि व हे नियम तुम्हीं मान्य करून पाळावे. २ ज्या
राष्ट्रांवर तुमची सत्ता बसेल त्यांतील लोक उंच डोंगरां-
वर, टेकड्यांवर आणि हरतऱ्हेच्या हिरव्या वृक्षांखालीं
ज्या ज्या ठिकाणीं आपआपल्या देवांची उपासना करीत
असतील त्या सर्व ठिकाणांचा अवश्य विध्वंस करा;
३ त्यांच्या वेद्या मोडून टाका, त्यांचे स्तंभ तोडून
टाका, त्यांच्या अशेरा मूर्ति अग्नींत जाळून टाका
व त्यांच्या देवांच्या कोरींव मूर्ति फोडूनतोडून टाका;
त्या ठिकाणांतून त्यांची नांवनिशाणी नाहींशी करा.
४ आपला देव परमेश्वर याच्या उपासनेसंबंधानें असें
करूं नका, ५ तर आपल्या नामाची स्थापना करण्या-
साठीं तुमचा देव परमेश्वर जें स्थान तुमच्या सर्व
वंशांच्या वतनांतून निवडून घेईल तेथें त्याच्या निवास-
स्थानीं तुम्ही त्याला शरण जा व तेथेंच येत जा;
६ आणि तेथेंच तुम्ही होमबलि, यज्ञ, दशमांश,
स्वहस्तानें समर्पिलेलीं अर्पणें, नवसाचीं अर्पणें,
स्वसंतोषाचीं अर्पणें आणि आपल्या गुरांढोरांचे व
शेरडांमेंढरांचे प्रथम वत्स आणावे; ७ त्याच स्थानीं
तुम्हीं आपला देव परमेश्वर याजसमोर भोजन
करावें आणि ज्या ज्या कामास तुम्ही हात घालाल
त्यांत तुमचा देव परमेश्वर तुम्हांस यश देईल तर
तुम्हीं व तुमच्या घरच्या मनुष्यांनीं त्या स्थानीं उत्सव
करावा. ८ आज या स्थलीं आपण प्रत्येक जण आपल्या
नजरेस योग्य दिसतील त्या गोष्टी करीत आहों; तेथें
तशा करूं नका; ९ जी विश्रामभूमि, जें वतन तुमचा
देव परमेश्वर तुम्हांस देत आहे तेथें तुम्ही अजून
जाऊन पोहंचलां नाहीं. १० तरी पण जेव्हां तुम्ही यार्देन
उतरून तुमचा देव परमेश्वर तुम्हांस वतन करून
देत आहे त्या देशांत वस्ती कराल, आणि जेव्हां तुमच्या
चोहोंकडल्या शत्रूंपासून तो तुम्हांस विश्राम देईल
आणि तेणेंकरून तुम्ही निर्भयतेनें राहाल, ११ तेव्हां जें
स्थल तुमचा देव परमेश्वर आपल्या नामाच्या निवासार्थ
निवडील तेथेंच मीं तुम्हांस सांगितलेल्या सगळ्या
वस्तु आणा; म्हणजे आपले होमबलि, यज्ञबलि,
व दशमांश, स्वहस्तें समर्पिलेलीं अर्पणें, परमेश्वरास
कराल ते विशिष्ट नवस. १२ तेथें तुम्ही आपले पुत्र व

कन्या, दास व दासी यांसहित आपला देव परमेश्वर याजसमोर उत्सव करावा; तुमच्या वेशींच्या आंत राहणाऱ्या लेव्यानेंहि आनंद करावा, कारण तुमच्याबरोबर त्यांस कांहीं वांटा किंवा वतन नाहीं. १३ तुझ्या दृष्टीस पडेल त्या भलत्याच ठिकाणीं होमबलि न अर्पिण्याची सावधगिरी ठेव; १४ तुझ्या एकाद्या वंशाच्या वतनांत जें स्थान परमेश्वर निवडील तेथेंच तूं आपले होमबलि अर्पावे आणि ज्या ज्या गोष्टींविषयीं मी तुला आज्ञा देत आहें त्या तेथेंच तूं कराव्या. १५ आपल्या सर्व वेशींच्या आंत तुझ्या इच्छेस येईल त्याप्रमाणें आणि तुझा देव परमेश्वर यानें तुला बरकत दिली असेल त्याप्रमाणें पशु मारून खा; त्यांचें मांस, हरणाचें किंवा सांबराचें मांस खातात त्याप्रमाणें, कोणाहि मनुष्यानें खावें; मग तो शुद्ध असो कीं अशुद्ध असो. १६ त्याचें रक्त मात्र सेवन करूं नये, पाण्याप्रमाणें तें जमिनीवर टाकून द्यावें; १७ आपलें अन्न, द्राक्षारस व तेल यांचा दशमांश, आपलीं गुरेंढोरें अथवा शेरडेंमेंढरें यांचे प्रथम वत्स, नवस केलेली एकादी वस्तु अथवा स्वसंतोषाचीं अर्पणें व स्वहस्तें समर्पित केलेलें अर्पण हीं आपल्या वेशींच्या आंत तूं खाऊं नयेत; १८ तर तुझा देव परमेश्वर जें स्थान निवडील तेथें तुझा देव परमेश्वर याजसमोर तीं खा; आपला पुत्र व कन्या, आपले दास व दासी, आपल्या वेशींच्या आंत असलेला लेवी यांच्याबरोबर तीं खा; आणि ज्या ज्या कामांस तूं आपला हात घालिशील त्यांसंबंधानें तुझा देव परमेश्वर याजसमोर आनंद कर. १९ संभाळ, जोंवर तूं स्वस्थानीं जीवंत राहशील तोंवर तुला लेव्यास सोडतां कामा नये.

२० तुझा देव परमेश्वर यानें आपल्या वचनानुसार तुझ्या देशाची मर्यादा वाढविल्यावर तुझ्या जिवाला मांस खाण्याची वांच्छा होऊन तें खावें असें वाटेल तर तुझ्या इच्छेस येईल त्याप्रमाणें तूं मांस खावें. २१ जें स्थान तुझा देव परमेश्वर आपल्या नामाच्या स्थापनार्थ निवडील तें तुजपासून फारच दूर असलें तर जीं गुरेंढोरें व शेरडेंमेंढरें परमेश्वरानें तुला दिलीं असतील त्यांतलें तुला वाटेल तें माझ्या आज्ञेप्रमाणें मारून आपल्या वेशींच्या आंत आपल्या इच्छेस येईल त्याप्रमाणें तूं खावें. २२ त्यांचें मांस, हरिण अथवा सांबर यांचें मांस खातात त्याप्रमाणें खावें; तें शुद्ध माणसानें व अशुद्ध माणसानेंहि खावें. २३ मात्र त्यांचें रक्त अगदीं सेवन करूं नये; कारण रक्त हें जीवन होय; मांसाबरोबर जीवन खाऊं नये; २४ तें सेवन करूं नये तर पाण्याप्रमाणें जमिनीवर टाकून द्यावें. २५ तूं तें सेवन करूं नये; परमेश्वराच्या दृष्टीनें जें योग्य आहे तें केल्यानें तुझें व तुझ्यामागून तुझ्या संततीचें कल्याण होईल; २६ पण तूं एकादी वस्तु पवित्र केली किंवा तिचा नवस केला तर परमेश्वर निवडील त्या स्थानीं ती वस्तु तुला नेली पाहिजे; २७ आणि तेथें आपल्या होमबलीचें मांस व रक्त हीं आपला देव परमेश्वर याच्या वेदीवर अर्पिलीं पाहिजेत; यज्ञपशूचें रक्त आपला देव परमेश्वर याच्या वेदीवर ओतावें आणि मग त्याचें मांस खावें. २८ ज्या गोष्टीविषयीं मी तुला आज्ञा करीत आहें त्या चित्त देऊन ऐक; तुझा देव परमेश्वर याच्या दृष्टीनें जें चांगलें व योग्य तें तूं केलें तर तुझें व तुझ्यामागून तुझ्या संततीचें निरंतर कल्याण होईल.

२९ ज्या राष्ट्रांवर तूं आपला ताबा बसविण्यास जात आहेस त्यांचा संहार तुझा देव परमेश्वर तुजपुढें करील व तूं त्यांचा सत्ताधीश होऊन त्या देशांत वसशील; ३० तेव्हां संभाळ, नाहींतर तुझ्यासमोर त्यांचा संहार झाल्यावर तुला त्यांचें अनुकरण करण्याचा मोह पडेल; हीं राष्ट्रें आपल्या देवाची उपासना करीत होतीं तशी आपणहि करूं असें मनांत आणून त्या देवांच्या नादीं तूं लागशील. ३१ तूं आपला देव परमेश्वर याच्या उपासनेसंबंधानें असें करूं नको; कारण ज्या ज्या गोष्टींचा परमेश्वरास वीट येतो व तिरस्कार करतो असल्या सर्व गोष्टी ते आपल्या देवासंबंधानें करीत होते; ते आपल्या पुत्रांचा व कन्यांचा देखील आपल्या देवांपुढें अग्नींत होम करीत होते.

३२ मी तुम्हांस सांगत आहें त्या गोष्टी लक्षपूर्वक पाळा; त्यांत अधिकउणें कांहीं करूं नका.

१३ १ तुझ्यामध्यें कोणी संदेष्टा अथवा स्वप्न पाहणारा प्रगट झाला व त्यानें तुला कांहीं चिन्ह अथवा चमत्कार दाखविला, २ आणि तें चिन्ह अथवा तो चमत्कार प्रत्ययासहि आला, आणि तो तुम्हांस म्हणाला कीं तुम्हांला ठाऊक नाहींत अशा अन्य देवांला अनुसरून त्यांची आपण उपासना करूं; ३ तर त्या संदेष्ट्याचें अथवा स्वप्न पाहणाऱ्याचें बोलणें ऐकूं नका; कारण तुम्ही आपला देव परमेश्वर याजवर जिवेंभावें प्रीति करितां किंवा नाहीं हें पाहण्यासाठीं तुमचा देव परमेश्वर तुमची ही अशी परीक्षा पाहील. ४ तुम्हीं आपला देव परमेश्वर यास अनुसरावें, त्याचें भय बाळगावें, त्याच्या आज्ञा पाळाव्या, त्याची वाणी ऐकावी, त्याची सेवा करावी आणि त्यासच धरून राहावें. ५ असल्या संदेष्ट्यास अगर असलीं स्वप्नें पाहणाऱ्यास जिवें मारावें; कारण ज्या तुमच्या देवानें तुम्हांस मिसर देशांतून आणिलें, दास्यगृहांतून सोडविलें, त्या देवानें तुम्हांस लावून दिलेल्या मार्गावरून बहकविण्यासाठीं तो तुम्हांस फितविण्याच्या गोष्टी सांगतो. या प्रकारें तूं आपल्यामधून त्या दुष्टाईचें निर्मूलन करावें.

६ तुझा भाऊ, तुझा सहोदर, तुझे पुत्र व कन्या, तुझी जिवलग स्त्री, तुझा प्राणप्रिय मित्र यांपैकीं कोणी तुला गुप्तपणें फुसलावून म्हणूं लागला कीं तुला अथवा तुझ्या पूर्वजांस अपरिचित असलेल्या अन्य देवांची आपण सेवा करूं या; ७ मग ते देव तुझ्या आजूबाजूच्या अगदीं जवळच्या लोकांचे असोत किंवा पृथ्वीच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत राहणाऱ्या दूरदूरच्या लोकांचे असोत, ८ तर तुम्हीं त्याच्या म्हणण्यास रुकार देऊं नये आणि त्याचें ऐकूं नये; त्याजवर दयादृष्टि करूं नये, त्याची गय करूं नये अथवा त्याला छपवून ठेवूं नये; ९ त्याला अवश्य जिवें मारावें, त्याला जिवें मारण्यासाठीं त्याजवर तुझा हात प्रथम पडावा आणि मग इतर सर्व लोकांचे हात पडावे. १० तो मरे तोंवर त्याला दगडमार करावा; कारण ज्या तुझ्या परमेश्वर देवानें तुला मिसर देशांतून दास्यगृहांतून काढून आणिलें त्याजपासून तुला बहकविण्याचा यानें यत्न केला आहे. ११ हें ऐकून सर्व इस्राएल लोकांस भीति वाटेल आणि तुमच्यामध्यें ते असलें दुष्कर्म पुनः करावयाचे नाहींत.

१२ तुझा देव परमेश्वर यानें तुला वस्ती करावयास दिलेल्या नगरांपैकीं एकाद्या नगराविषयीं तुझ्या कानावर अशी बातमी आली कीं १३ तुमच्यांतून कांहीं अधम पुरुष निघाले आणि त्यांनीं आपल्या नगरवासी जनांस आजपर्यंत तुम्हांस अपरिचित अशा अन्य देवांची आपण उपासना करावयास चलावें, असें म्हणून बहकविलें, १४ तर पुसतपास करावा, शोध करावा, लक्षपूर्वक पत्ता काढावा; आणि ही गोष्ट खरी असली, आणि तुमच्यामध्यें असलें अमंगळ कृत्य होत आहे याविषयीं कांहीं संशय नसला, १५ तर त्या नगरच्या रहिवाश्यांस तरवारीनें अवश्य मारून टाकावें, आणि त्या नगराचा व त्यांत असलेले पशु आदिकरून सर्व प्राणी शापित म्हणून त्यांचा तरवारीनें संहार करावा. १६ त्या नगरांतील सर्व लूट चवाठ्यावर जमा करावी, आणि तें नगर त्यांतल्या लुटीसुद्धां आपला देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ सर्वस्वी जाळून फस्त करावें; त्याचा ढिगार निरंतर तसाच पडूं द्यावा, तें पुनः वसवूं नये. १७ अशा शापित वस्तूंतलें कांहींएक तुझ्या हाताला लागून राहूं नये; म्हणजे परमेश्वर आपल्या तीव्र कोपापासून निवृत्त होऊन तुझ्या पूर्वजांशीं आणभाक केल्याप्रमाणें तुजवर दया करील व तुझा त्याला कळवळा येऊन तुला तो बहुगुणित करील; १८ ज्या आज्ञा आज मी तुला सांगत आहें त्या सर्व तूं आपला देव परमेश्वर याची वाणी ऐकून पाळिशील आणि तुझा देव परमेश्वर याच्या दृष्टीनें जें योग्य तेंच करशील तर असें होईल.

१४ १ तुम्ही आपला देव परमेश्वर याचे पुत्र आहां; मयताकरितां आपल्या अंगावर घाय करूं नका; आपला भालप्रदेश मुंडूं नका; २ कारण तूं आपला देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ पवित्र आहेस आणि परमेश्वरानें तुला या भूतळावरील सर्व लोकांतून स्वप्रजा व्हावयास निवडून घेतलें आहे.

३ कांहीं अमंगळ पदार्थ खाऊं नको. ४ तुम्हीं
खावयाचीं जनावरें तीं हीं: गाईबैल, शेरडेंमेंढरें,
५ सांबर, हरिण, भेंकर, चितळ, रोही, गवा व डांगळ;
६ ज्यांचें खूर चिरलेले व दुभागलेले असून जे रवंथ
करितात असल्या पशूंचें मांस तुम्हीं खावें; ७ पण
जे केवळ रवंथ करितात किंवा ज्यांचे नुसते खूरच
चिरलेले आहेत ते खाऊं नयेत; उंट, ससा व शाफान
हे खाऊं नयेत, कारण ते रवंथ करितात, पण त्यांचे
खूर चिरलेले नाहींत, म्हणून ते तुम्हांस निषिद्ध होत.
८ डुकराचा खूर चिरलेला आहे, पण तो रवंथ करीत
नाहीं म्हणून तो तुम्हांस निषिद्ध आहे; तुम्हीं त्यांचें
मांस खाऊं नये, त्यांच्या शवांस शिवूं नये.

९ जलचरांपैकीं तुम्हीं खावयाचे ते हे: ज्यांस पंख
व खवले असतात ते तुम्हीं खावे; १० पण ज्यांस
पंख आणि खवले नाहींत ते तुम्हीं खाऊं नयेत; ते
तुम्हांस निषिद्ध आहेत.

११ सर्व शुद्ध पक्षी खावे. १२ तुम्हीं खाऊं नयेत
ते हे: गरुड, दाढी असलेला गीध, कुरर; १३ गीध,
ससाणा, निरनिराळ्या जातींच्या घारी; १४ अनेक
जातींचे कावळे; १५ शहामृग, गवळण, कोकीळ,
नाना जातींचे बहिरीससाणे; १६ पिंगळ, मोठा घुबड,
राजहंस; १७ पाणकोळी, गिधाड, करडोक, १८ बगळा,
निरनिराळ्या जातींचे करकोंच, टिटवी आणि वाघूळ.
१९ पंख असून रांगत जाणारे प्राणी तुम्हांस निषिद्ध
आहेत, ते तुम्हीं खाऊं नयेत. २० सर्व शुद्ध पक्षी
तुम्हीं खावे.

२१ आपोआप मेलेलें तुम्हीं कांहींहि खाऊं नये;
तुझ्या वेशींच्या आंत असलेल्या परदेशीयास तें खावयास
द्यावें किंवा परदेशस्थांस पाहिजे तर विकून टाकावें;
कारण तूं आपला देव परमेश्वर याची पवित्र प्रजा
आहेस. करडूं त्याच्या आईच्या दुधांत शिजवूं नको.

२२ वर्षानुवर्ष तुझ्या शेतांतल्या पेऱ्यापासून जें
कांहीं उत्पन्न होईल त्याचा दशमांश अवश्य वेगळा
काढून ठेव. २३ जें स्थळ तुझा देव परमेश्वर आपल्या
नामाच्या निवासासाठीं निवडील तेथें आपलें अन्न,
द्राक्षारस व तेल यांचा दशमांश आणि आपलीं गुरें-
ढोरें व शेरडेंमेंढरें यांचे प्रथम वत्स आपला देव पर-
मेश्वर याजसमोर खा; अशानें तूं आपला देव परमेश्वर
याचें भय निरंतर बाळगण्यास शिकशील. २४ पण
तुझा देव परमेश्वर यानें आपलें नाम स्थापण्यासाठीं
जें स्थल निवडिलें असेल तें फार दूर असलें व तेथला
प्रवास फार लांबचा असल्यामुळें तुझा देव परमेश्वर
याच्या प्रसादानें मिळेल त्याचा दशमांश तेथें तुला घेऊन
जातां आलें नाहीं, २५ तर तूं तो विकून त्याचा
पैसा कर व तो पैसा बांधून हातीं घेऊन तुझा देव
परमेश्वर यानें निवडिलेल्या स्थलाकडे घेऊन जा. २६
तेथें गाईबैल, शेरडेंमेंढरें, द्राक्षारस, मदिरा अथवा तुझ्या
मनास वाटेल ती वस्तु ते पैसे देऊन घे, आणि
आपला देव परमेश्वर याजसमोर आपल्या घराण्या-
सह खाऊनपिऊन आनंद कर; २७ आणि आपल्या
वेशींच्या आंत असलेल्या लेव्यास वगळूं नको; कारण
त्याला तुजबरोबर कांहीं हिस्सा किंवा वतन नाहीं.

२८ प्रत्येक तीन वर्षांच्या अखेरीस त्या वर्षाच्या
उत्पन्नाचा दशमांश बाजूस काढून आपल्या वेशींच्या
आंत जमा कर; आणि लेव्यास तुझ्याबरोबर कांहीं
हिस्सा किंवा वतन नाहीं म्हणून तो आणि तुझ्या
वेशींच्या आंत असलेला परदेशी अनाथ व विधवा
यांनींहि येऊन पोटभर खावें, म्हणजे तुझा देव परमेश्वर
तुझ्या हातच्या सर्व कामास बरकत देईल.

१५ १ दर सात वर्षांच्या अखेरीस तूं ऋण-
विमोचन करावें. २ ऋणविमोचन करण्याचा
प्रकार हा: कोणीं सावकारानें आपल्या शेजा-
ऱ्यास कर्ज दिलें असेल तर त्यानें तें त्याला सोडून
द्यावें; आपला शेजारी अथवा भाऊबंद याजपासून तें
उगवून घेऊं नये; कारण परमेश्वराच्या नांवानें
ऋणविमोचन करण्याचें जाहीर झालें आहे;
३ परक्यापासून पाहिजे तर कर्ज उगवून घे; पण
तुझ्या बांधवाकडे तुझें कांहीं येणें असलें तर तूं तें
स्वहस्तें सोडून दे. ४ तुझ्यामध्यें कोणी दरिद्री
व्हावयाचा नाहीं; कारण तुझा देव परमेश्वर ज्या

देशाचें तुला वतन करून देत आहे त्यांत तो तुला अवश्य समृद्ध करील; ५ मात्र तुझा देव परमेश्वर याची वाणी तूं चित्त देऊन ऐकावी आणि आजमितीस हें जें धर्मशास्त्र मी तुला विहित करीत आहें तें सगळें मान्य करून पाळावें. ६ कारण तुझा देव परमेश्वर तुला दिलेल्या वचनानुसार तुझें अभीष्ट करील; तूं बहुत राष्ट्रांस कर्ज देशील पण तूं कर्ज काढणार नाहींस; तूं अनेक राष्ट्रांवर सत्ता करिशील पण त्यांची तुझ्यावर सत्ता चालावयाची नाहीं.

७ तुझा देव परमेश्वर जो देश तुला देत आहे त्यांत तुझ्या कोणत्याहि वेशीच्या आंत तुझ्या बांधवांपैकीं कोणी लाचार मनुष्य तुझ्यापाशीं राहत असला तर त्याजविषयीं आपलें हृदय कठोर करूं नको, आपला हात आखडूं नको; ८ तूं आपला हात अवश्य सढळ ठेव, त्याची गरज भागेल तेवढें त्याला उसनें दे. ९ संभाळ, ऋणविमोचनाचें सातवें वर्ष जवळ आलें आहे असें म्हणून आपल्या मनांत अधम विचार येऊं देऊं नको; आपल्या लाचार बांधवावर वक्रदृष्टि करून तूं एकादे वेळीं त्याला कांहीं द्यावयाचा नाहींस आणि त्यानें तुझ्याविरुद्ध परमेश्वराकडे गाऱ्हाणें केलें तर तुला पाप लागेल. १० तूं त्याला अवश्य द्यावें, व तूं त्याला देशील तेव्हां तुझ्या मनांत कांहींएक वाईट वाटूं देऊं नको; असें केल्यानें ज्या ज्या कामास तूं हात घालिशील त्यांत तुझा देव परमेश्वर तुला बरकत देईल. ११ देशांतले कंगाल लोक कधीं नाहींतसे होणार नाहींत; म्हणून मी तुला आज्ञा करीत आहें कीं तुझ्या देशांतले तुझे गरजू आणि कंगाल बांधव यांस सढळ हातानें दे.

१२ तुझ्या बांधवांपैकीं कोणी इब्री अथवा इब्रीण तुला विकिली असली तर त्यानें किंवा तिनें सहा वर्षें दास्य केल्यावर सातवे वर्षी त्याला किंवा तिला मुक्त करून जाऊं दे. १३ तूं त्याला मुक्त करिशील तेव्हां त्याला रिक्तहस्तें पाठवूं नको; १४ तर तुझीं शेरडेंमेंढरें, तुझें खळें व द्राक्षाकुंड यांतून उदार हस्तें त्याला दे; तुला परमेश्वरानें समृद्ध केलें असेल त्याप्रमाणें त्याला दे. १५ मिसर देशांत तूंहि दास होतास आणि तुझा देव परमेश्वर यानें तुला मुक्त केलें याचें स्मरण ठेव; यास्तव ही आज्ञा आज मी तुला देत आहें. १६ तरी पण त्या दासाचें तुझ्यावर व तुझ्या घराण्यावर प्रेम जडलें असेल व तो आनंदानें तुझ्या घरीं नांदत असून तुला म्हणेल कीं मी तुला सोडून जाणार नाहीं, १७ तर त्याचा कान दरवाजावर धरून आरीनें टोंच म्हणजे तो तुझा निरंतरचा दास होईल; तुझ्या दासीचेंहि असेंच कर. १८ त्याला मुक्त करून जाऊं देणें तुला जड वाटूं नये; कारण सहा वर्षेपर्यंत मोलकऱ्याच्या दुप्पट तुझी सेवाचाकरी त्यानें केली आहे; असें केल्यानें तुझा देव परमेश्वर तुझ्या सर्व कामांत तुला बरकत देइल.

१९ तुझीं गुरेंढोरें व शेरडेंमेंढरें यांतील सगळे प्रथम जन्मलेले नर तुझा देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ पवित्र राखावे; गाईचा प्रथम वत्स कांहीं कामास लावूं नको आणि शेरडांमेंढरांतल्या प्रथम वत्साची लोकर कातरूं नको. २० तुझा देव परमेश्वर जें स्थान निवडील तेथें तूं परमेश्वरासमोर आपल्या घराण्यासह वर्षानुवर्ष त्यांचें मांस खात जा; २१ पण त्यांतल्या कोणांत कांहीं दोष असला, म्हणजे त्यांतला एकादा लंगडा किंवा अंधळा असला किंवा त्याला दुसरी कोणतीहि खोड असली तर त्याचें अर्पण तुझा देव परमेश्वर याला करूं नको. २२ आपल्या वेशींच्या आंत तो भक्षावा; हरिणाचें किंवा सांबराचें मांस खातात त्याप्रमाणें शुद्ध माणसांनीं व अशुद्ध माणसांनीं त्याचें मांस खावें. २३ मात्र त्याच्या रक्ताचें सेवन करूं नये, तर तें पाण्याप्रमाणें जमिनीवर टाकून द्यावें.

**१६** १ आपला देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ अबीब महिना पाळ आणि वल्हांडण सण कर; कारण अबीब महिन्यांत तुझा देव परमेश्वर यानें तुला मिसर देशांतून रात्रीचें बाहेर आणिलें. २ जें स्थान परमेश्वर आपल्या नामाच्या निवासार्थ निवडील तेथें आपला देव परमेश्वर याजसाठीं शेरडेंमेंढरें आणि गाईबैल यांतून वल्हांडणाचा यज्ञपशु अर्पावा. ३ त्याबरोबर खमिराची भाकर खाऊं नये; सात दिवस तूं

त्याबरोबर बेखमीर भाकर म्हणजे दुःखस्मारकाची भाकर खावी, कारण तूं धांदलीनें मिसर देशांतून बाहेर निघालास; ह्याच्यायोगें मिसर देशांतून निघाल्या दिवसाचे तुला जन्मभर स्मरण राहील. ४. सात दिवस पर्यंत तुझ्या सगळ्या देशांत खमीर दृष्टीसहि पडूं नये: आणि पहिल्या दिवशीं संध्याकाळीं जो बलि देशील त्याचें कांहींसुद्धां मांस सकाळपर्यंत राहूं नये. ५. तुझा देव परमेश्वर जीं नगरें तुला देईल त्याच्या कोणत्याही वेशींच्या आंत वल्हांडणाचा यज्ञपशु अर्पावयाचा नाहीं. ६ तर तुझा देव परमेश्वर आपल्या नामाच्या निवासांसाठी जें स्थान निवडील तेथेंच ज्या समयीं तूं मिसर देशांतून निघालास म्हणजे अर्थात् सूर्यास्ताच्या वेळीं, संध्याकाळीं वल्हांडणपशूचा यज्ञ करावा. ७. तुझा देव परमेश्वर जें स्थान निवडील तेथेंच तो भाजून खावा: मग सकाळीं उठून आप आपल्या डेऱ्यात जावें. ८. सहा दिवस बेखमीर भाकरी खाव्या, आणि सातव्या दिवशीं तुझा देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ मोठा मेळा भरवावा: त्या दिवशीं कोणतेंहि कामकाज करूं नये.

९ तू सात सप्तकांची गणंती कर; उभ्या पिकाला विळा लाविल्यापासून सात सप्तकें मोज. १० मग तुझा देव परमेश्वर यानें तुला समृद्ध केंल असेल त्या मानानें त्याला स्वसंतोषचा बलि अर्पून सप्तकांचा सण पाळ; ११ तुझा देव परमेश्वर आपल्या नामाच्या निवासा साठीं जे स्थल निवडील तेथें आपला पुत्र व कन्या, दास व दासी, आणि तुझ्या वेशींच्या आंतला लेवी, आणि तुझ्यामध्यें असलेले परदेशीय पोरके, विधवा या सर्वांबरोबर आपला देव परमेश्वर याजसमोर उत्सव कर. १२ तूं मिसर देशांत दास होतास यांचें तुला स्मरण राहावें म्हणून हे विधि मान्य करून पाळवे.

१३ आपल्या खळ्यांतील आणि द्राक्षाकुंडांतील उत्पन्नाचा संग्रह करण्याचें संपल्यावर मंडपांचा सण सात दिवस पाळावा; १४ ह्या पर्वकाळीं तुझे पुत्र व कन्या, दास व दासी व तुझ्या वेशींच्या आंत असलेला लेवी, परदेशीय, पोरके व विधवा यांजसह उत्सव करावा. १५ जें स्थान परमेश्वर निवडील तेथें तूं आपला देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ सात दिवस सण पाळवा; कारण सर्व उत्पन्न व हानी घरिलेलीं कामें यासंबंधानें तुझा देव परमेश्वर यानें तुला बरकत दिल्यामुळें तुला अत्यानंद होईल. १६ दर वर्षी तीन बेळां म्हणजे बेखमीर भाकरीचा सण, सप्तकांचा सण, आणि मंडपांचा सण या तिन्ही पर्वणीस तुझ्या सर्व पुरुषांनी तुझा देव परमेश्वर जें स्थान निवडील तेथें त्याजसमोर जाऊं; कोणीहि रित्कहस्ते परमेश्वरासमोर जाऊं नये; १७ तुझा देव परमेश्वर यानें तुला बरकत दिली असेल त्या मानानें प्रत्येकानें आपल्या ऐपतीप्रमाणें द्यावें.

१८ तुझा देव परमेश्वर जी नगरें तुला देईल त्यांत आपआपल्या वंशांतले न्यायाधीश व सरदार नेमावे; त्यांनी लोकांचा न्याय धर्मनीतीनें करावा. १९ विपरीत न्याय करु नये, पक्षपात करू नये आणि लांच घेऊं नये; कारण लांच शहाण्याचे डोंळे अंधळे करितो आणि धार्मिकांचे निर्णय विपरीत करीते. २० नीतिमंत्तेचीच कास धर म्हणजे तु जीवंत रहशील आणि तुझा देव परमेश्वर जो देश तुला देत आहे त्याचा तूं वतनदार होशील.

२१ तू आपला देव परमेश्वर याजसाठी जी वेदी करिशील तिच्याजवळ कोणात्याहि प्रकारच्या काष्टची अशेरा मूर्ति स्थापूं नको: २२ त्याप्रमाणेंच कोणताहि स्तंभ उभारू नको, कारण तुझा देव परमेश्वर याला त्याची किळस आहे.

**१७** १ कांहीं दोष अथवा खोड असलेलें गुरु अथवा मेंढरु आपला देव परमेश्वर याला अर्पू नको; कारण तुझा देव परमेश्वर यास त्याचा वीट आहे. **२** तुझा देव परमेश्वर यानें तुला दिलेल्या गांवांच्या वेशीच्या आंत कोणी पुरुष अथवा स्त्री तुझा देव परमेश्वर याचा करार मोडून त्याच्या दृष्टीनें काही दुष्कर्म करिताना आढळून आली, ३ म्हणजे माझ्या आज्ञेचा अतिक्रम करुन अन्य देवांची अथवा सूर्य, चंद्र, व नक्षत्रगण यांची उपासना व पूजा तो करु

लागलीं, ४ आणि हें तुला कोणीं सांगितल्यावरून
तुझ्या कानावर आलें तर त्याचा चांगला तपास कर;
आणि तें खरें ठरून इस्राएल लोकांत असलें अमंगळ
कृत्य घडल्याची खात्री झाली असेल ५ तर ज्या
पुरुषानें अथवा ज्या स्त्रीनें असलें दुष्कर्म केलें असेल
त्या पुरुषास अथवा त्या स्त्रीस वेशींबाहेर काढून
मरत तोंपर्यंत त्यांस दगडमार कर. ६ ज्याचा वध
करावयाचा त्याला दोघां अथवा तिघां साक्षीदारांच्या
साक्षीवरून वधावें; एकाच साक्षीदाराच्या साक्षीवरून
त्यास वधूं नये. ७ ज्याचा वध करावयाचा त्याच्यावर
प्रथम साक्षीदारांनीं आणि मग लोकांनीं आपले हात
उचलावे. या प्रकारें आपल्यामधून असली दुष्टाई
नाहींशी करावी.

८ तुझ्या वेशींच्या आंत आपसांतला एखादा खून,
दावा अथवा मारामारी यासंबंधाचा वाद उपस्थित
होऊन त्याचा निवाडा करण्याचें काम तुझ्या आटोक्या-
बाहेर असलें तर तुझा देव परमेश्वर यानें निवडलेल्या
स्थानीं जा, ९ आणि लेवीय याजक व त्या त्या काळचे
शास्ते यांना जाऊन विचार; ते तुला वादाचा निर्णय
सांगतील; १० परमेश्वरानें निवडलेल्या स्थानीं जो
निर्णय ते सांगतील त्याप्रमाणें तूं कर, आणि ते जें
कांहीं तुला अनुशासन देतील तें मान्य करून त्याप्रमाणें
कर. ११ तुला जें अनुशासन ते देतील आणि जो
निर्णय तुला सांगतील त्याप्रमाणें कर; त्यांनी तुला
सांगितलेल्या निर्णयापासून उजवीडावीकडे वळूं नको.
१२ जो मनुष्य उन्मत्त होऊन तुझा देव परमेश्वर
याच्या सेवेस हजर राहणाऱ्या याजकाचें किंवा न्याया-
धीशाचें ऐकणार नाहीं तो मनुष्य प्राणास मुकावा;
अशा प्रकारें इस्राएलांतून तूं ही दुष्टाई नाहींशी करावी.
१३ हें ऐकून सर्व लोक दहशत पावतील व तेथून पुढें
उन्मत्तपणा करावयाचे नाहींत.

१४ तुझा देव परमेश्वर यानें तुला दिलेल्या देशांत
जाऊन तेथें वतन करून राहिल्यावर तूं कदाचित्
म्हणशील कीं आसपासच्या राष्ट्रांप्रमाणें मी आपल्यावर
राजा नेमीन, १५ तर तुझा देव परमेश्वर ज्यास
निवडील त्यालाच राजा करावें; आपल्या भाऊबंदांतून
आपल्यावर राजा नेमावा; तुझ्या बांधवांपैकीं नाहीं असा
कोणी परदेशीय पुरुष आपल्यावर नेमूं नको. १६ मात्र
त्यानें पुष्कळ घोडे बाळगूं नयेत, घोडदळ वाढविण्या-
साठीं लोकांना मिसराकडे पुन: धाव घेण्यास लावूं
नये, त्या मार्गानें पुन: परत जाऊं नको असें परमे-
श्वरानें तुम्हांस सांगितलेंच आहे. १७ राजानें बहुत
स्त्रिया करूं नयेत, नाहीं तर त्याचें मन बहकून
जावयाचें; आणि सोनेंरुपें यांचा त्यानें विपुल संग्रह
करूं नये. १८ तो आपल्या राज्यासनावर आरूढ
होईल तेव्हां लेवीय याजकांपाशीं असलेल्या शास्त्राची
एक नक्कल त्यानें करवावी; १९ तें शास्त्र त्यानें
आपल्याजवळ ठेवून जन्मभर त्याचें अध्ययन करावें;
म्हणजे तो आपला देव परमेश्वर याचें भय बाळगून
हें सगळें शास्त्र व हे सर्व विधि पाळावयास शिकेल;
२० अशानें त्याचें हृदय आपल्या बांधवांसंबंधानें
उन्मत्त होणार नाहीं आणि तो धर्मशास्त्र सोडून
उजवीडावीकडे वळावयाचा नाहीं; तो व त्याचे वंशज
इस्राएल लोकांमध्यें चिरकाळ राज्य करितील.

१ लेवीय याजक आणि लेव्याचा अवघा
१८ वंश यांस इस्राएल लोकांत कांहीं वांटा किंवा
वतन नाहीं; परमेश्वरास अर्पावयाचीं हव्यें व
परमेश्वराच्या हक्काचें असेल तें, हीं त्यांनीं भोगावीं.
२ त्यांच्या भाऊबंदांबरोबर त्यांस कांहीं वतन मिळावयाचें
नाहीं, तर परमेश्वरानें त्यांस सांगितल्याप्रमाणें तोच
त्यांचें वतन होय. ३ गाईबैलांचा यज्ञ असो कीं शेरडां-
मेंढरांचा यज्ञ असो, तो करणाऱ्या लोकांनीं याजकाला
हक्क द्यावयाचा तो हा: फरा, दोन्ही गालफडें आणि
कोथळा. ४ धान्य, द्राक्षारस व तेल यांच्या उत्पन्नाचा
प्रथम भाग आणि मेंढरांची प्रथम कातरलेली लोकर
तूं त्यास द्यावी. ५ त्यानें व त्याच्या वंशजांनीं निरंतर
परमेश्वराच्या नामाची सेवाचाकरी करण्यास हजर
राहावें म्हणून तुझा देव परमेश्वर यानें त्यांस तुझ्या
सर्व वंशांतून निवडून घेतलें आहे.

६ कोणी लेवी इस्राएल लोकांच्या एखाद्या वेशीच्या

आंत उपऱ्याप्रमाणें राहत असून तेथून मोठ्या उत्सुकतेनें परमेश्वरानें निवडलेल्या स्थानीं गेला, ७ तर परमेश्वरासमोर सेवाचाकरी करणाऱ्या आपल्या लेवीय बांधवाप्रमाणें त्यानें आपला देव परमेश्वर याच्या नामानें सेवा करावी. ८ त्याचें पितृधन विकून जें त्याला मिळालें असेल त्याखेरीज त्यांच्याप्रमाणेंच अन्नाचा वांटा त्यास मिळावा.

९ तुझा देव परमेश्वर तुला जो देश देत आहे त्यांत जाशील तेव्हां त्यांतल्या लोकांप्रमाणें अमंगळ कर्मे करावयास शिकूं नको. १० आपल्या पुत्रांचा व कन्यांचा अग्नींत होम करणारा, दैवज्ञ, शकुन सांगणारा, जादुगार, चेटकी, ११ मांत्रिक, देवऋषि, पंचाक्षरी अथवा इलमी असा तुमच्यापैकीं कोणी नसावा. १२ जो कोणी असलीं कृत्यें करितो त्याचा परमेश्वराला वीट आहे, आणि ह्या असल्या त्यांच्या अघोर कृत्यांमुळेंच तुझा देव परमेश्वर त्यांस तुझ्यापुढून घालवून देत आहे. १३ तूं आपला देव परमेश्वर याजशीं सात्विकतेनें वाग. १४ ज्या राष्ट्रांचा तूं ताबा घेणार आहेस तीं शुभाशुभ मुहूर्त मानणारीं आणि ठोकताळ्यांनीं भाकीत करणारांचें ऐकणारीं आहेत; पण तुझा देव परमेश्वर यानें तुला तसें करूं दिलें नाहीं. १५ तुझा देव परमेश्वर तुझ्यामधून म्हणजे तुझ्या भाऊबंदांमधून माझ्यासारखा एक संदेष्टा तुजकरितां उत्पन्न करील, त्याचें तुम्ही ऐका; १६ होरेब डोंगरापाशीं मंडळी जमली होती त्या दिवशीं आपला देव परमेश्वर याजपाशीं तूं विनंति केली होती त्याप्रमाणें होईल; तूं म्हणालास कीं माझा देव परमेश्वर याचा शब्द पुनः माझ्या कानीं न पडो, त्याचा प्रचंड अग्नि पुनः माझ्या दृष्टीस न पडो, पडला तर मी मरेन. १७ तेव्हां परमेश्वर मला म्हणाला, हे लोक म्हणतात तें ठीक आहे. १८ मी त्यांच्यासाठीं त्यांच्या भाऊबंदांतून तुझ्यासारखा एक संदेष्टा उत्पन्न करीन; त्याच्या मुखीं मी आपलीं वचनें घालीन आणि त्यांस ज्या आज्ञा मी देईन त्या सगळ्या त्यांस तो निवेदन करील. १९ जीं माझीं वचनें तो माझ्या नांवानें बोलेल तीं जो कोणी ऐकावयाचा नाहीं त्याचा मी झाडा घेईन; २० पण कोणी संदेष्टा उन्मत्त होऊन जें बोलावयाची आज्ञा मीं त्यास दिली नाहीं तें माझ्या नांवानें किंवा अन्य देवांच्या नांवानें बोलेल तर तो प्राणास मुकेल. २१ परमेश्वर अमुक वचन बोलला नाहीं हें आम्हीं कशावरून ओळखावें असा तुला संदेह वाटला, २२ तर कोणी संदेष्टा परमेश्वराच्या नामानें कांहीं बोलला आणि त्याप्रमाणें घडलें नाहीं किंवा प्रत्ययास आलें नाहीं तर परमेश्वराचें तें बोलणें नव्हतें असें खास समजावें; तो संदेष्टा अहंकारानें बोलला आहे; तूं त्याची भीति धरूं नको.

१९ १ तुझा देव परमेश्वर ज्या राष्ट्रांचा देश तुला देत आहे त्यांचा त्यानें नाश केल्यावर तूं त्यांच्या देशाचा ताबा घेशील, त्यांच्या नगरांतून व घरांतून वस्ती करिशील, २ तेव्हां तुझा देव परमेश्वर जो देश तुला वतन करून देत आहे त्यांत तुझ्यासाठीं तीन नगरें वेगळीं करून ठेव. ३ प्रत्येक मनुष्यवध करणाऱ्यास तेथें पळून जातां यावें म्हणून रस्ते तयार कर, आणि जो देश तुझा देव परमेश्वर तुला वतन म्हणून देत आहे त्या एकंदर देशाचे तीन भाग कर. ४ मनुष्यवध केल्यावर तेथें पळून जाऊन आपला प्राण वांचविणाऱ्याचा प्रकार असा: पूर्वीचा कांहीं वैरभाव नसतां जो कोणी नकळत आपल्या शेजाऱ्यास ठार मारील त्यानें तेथें जावें. ५ उदाहरणार्थ, कोणी आपल्या शेजाऱ्याबरोबर लाकडें तोडावयास रानांत गेला असतां, झाड तोडण्यासाठीं त्यानें आपल्या हातानें कुऱ्हाडीचा घाव त्यावर घालतांना ती दांड्यांतून निसटून त्याच्या शेजाऱ्यास लागून तो मरण पावला; असा मनुष्य त्यांतल्या एका नगरांत पळून गेला तर तो वांचेल. ६ अशीं नगरें नसलीं तर त्याला लांबची वाट धरावी लागेल आणि खुनाचा सूड घेणारा रागाच्या भरांत त्याला गांठून मारून टाकील. खरें पाहतां तो प्राणदंडास योग्य नाहीं, कारण त्याचें त्याजशीं अगोदरचें वैर नव्हतें. ७ यास्तव मी तुम्हांस आज्ञा करितों कीं तुम्हीं

आपल्यासाठीं तीन नगरें वेगळीं करून ठेवा. ८,९ तुझा देव परमेश्वर याजवर प्रीति कर आणि त्याच्या मार्गांनीं निरंतर चाल अशी आज्ञा मी तुला आज देत आहें; ती तूं पाळिली व तुझा देव परमेश्वर यानें तुझ्या पूर्वजांशीं आणभाक केली होती त्याप्रमाणें त्यानें तुझी देशमर्यादा वाढविली, आणि तुझ्या पूर्वजांस देऊं केलेला सगळा देश तुला दिला, तर सदरील तीन नगरांशिवाय आणखी तीन नगरें तूं वेगळीं करून ठेवावीं; १० म्हणजे जो देश तुझा देव परमेश्वर तुला वतन करून देत आहे त्यांत निर्दोष मनुष्याचा रक्तपात होणार नाहीं आणि त्याची हत्या तुला लागणार नाहीं. ११ तरी पण कोणी आपल्या शेजाऱ्याचा दावा धरून त्याच्या घातासाठीं टपेल आणि त्याजवर उठून तो मरेल इतका त्याला घायाळ करील आणि मग त्यांतल्या एका नगरांत पळून जाईल, १२ तर त्याच्या गांवच्या वडील मंडळीनें माणूस पाठवून तेथून त्याला आणवावें आणि त्याला मारून टाकण्यासाठीं खुनाचा सूड घेणाऱ्यांच्या हातीं द्यावें. १३ त्याजवर दयादृष्टि करूं नये; निरपराध हत्येचा दोष इस्राएलापासून दूर कर म्हणजे तुझें कल्याण होईल.

१४ तुला मिळणाऱ्या वतनांत, म्हणजे जो देश तुझा देव परमेश्वर तुला देत आहे त्यांत पूर्वींच्या लोकांनीं ठरविलेली आपल्या शेजाऱ्याची सीमा ढळवूं नको.

१५ कोणीं कांहीं अधर्म किंवा पापकर्म केलें तर त्यानें केलेल्या त्या पापासंबंधानें त्याच्याविरुद्ध कोणी एकटाच साक्षीदार उठला तर चालणार नाहीं; दोघां किंवा तिघां साक्षीदारांच्या साक्षीनें कोणत्याहि प्रकरणाचा निर्णय करावा. १६ एकादा खुनशी साक्षीदार उठून त्यानें अमुक एका मनुष्यानें अनाचार केल्याची साक्ष दिली; १७ तर ज्या दोघांमध्यें हा वाद उपस्थित होईल त्यांस परमेश्वरापुढें म्हणजे त्या समयीं जे याजक अथवा न्यायाधीश असतील त्यांच्यापुढें उभें करावें; १८ मग न्यायाधीशांनीं त्याचा बारीक तपास करावा; आणि तो खोटा साक्षीदार असून त्यानें आपल्या बांधवाविरुद्ध खोटी साक्ष दिली आहे असें आढळून आलें, १९ तर आपल्या बांधवाची जी हानि करण्याचें त्यानें योजिलें असेल तीच हानि त्याची करावी; या रीतीनें तूं आपल्यांतील दुष्टाई काढून टाकावी. २० इतर लोक हें ऐकून दहशत पावतील आणि पुढें तुझ्यामध्यें असलें दुष्कर्म करणार नाहींत. २१ तूं दयादृष्टि करूं नये; जिवाबद्दल जीव, डोळ्याबद्दल डोळा, दांताबद्दल दांत, हाताबद्दल हात आणि पायाबद्दल पाय असा दंड करावा.

२० १ तूं आपल्या शत्रूंशीं युद्ध करावयास जाशील तेव्हां घोडे, रथ व तुझ्याहून अधिक सैन्य हीं तुझ्या दृष्टीस पडल्यास त्यांस भिऊं नको; तुझा देव परमेश्वर यानें तुला मिसर देशांतून आणिलें तो तुझ्याबरोबर आहे. २ तुम्ही समरांगणावर जाल तेव्हां याजकानें लोकांकडे जाऊन त्यांस म्हणावें, ३ इस्राएल लोकहो, ऐका; युद्ध करण्यास तुम्ही आज आपल्या शत्रूंच्या निकट आलां आहां, तर तुमचें मन कचर देऊं नका, भिऊं नका, थरथर कांपूं नका, आणि त्यांस पाहून घाबरूं नका; ४ कारण तुमच्या शत्रूंशीं युद्ध करावयास व तुमचा बचाव करावयास तुमच्याबरोबर जाणारा तुमचा देव परमेश्वर आहे. ५ मग अमलदारांनीं लोकांस म्हणावें, ज्यानें नवें घर बांधून त्यांत प्रवेश केला नाहीं असा कोणी मनुष्य तुमच्यामध्यें आहे काय? असल्यास त्यानें आपल्या घरीं परत जावें, नाहीं तर तो युद्धांत कदाचित् मरून जाईल व दुसराच गृहप्रवेश करील. ६ द्राक्षांचा मळा लावून त्याचें फळ खाल्लें नाहीं असा कोणी आहे काय? असल्यास त्यानें घरीं परत जावें, नाहीं तर तो संग्रामांत मरण पावल्यास दुसराच कोणी त्याचें फळ खाईल. ७ बायकोची मागणी करून तिजशीं लग्न केलें नाहीं असा कोणी आहे काय? असल्यास त्यानें आपल्या घरीं परत जावें, नाहीं तर तो संग्रामांत मरण पावल्यास दुसराच कोणी तिजशीं लग्न करील. ८ अमलदारांनीं लोकांस आणखी म्हणावें कीं तुमच्यांतला कोणी भ्याड अथवा घाबरट मनाचा आहे काय?

असल्यास त्यानें आपल्या घरीं परत जावें, नाहीं तर
त्याला पाहून त्याच्या बांधवांच्या हृदयाचें त्याच्या-
सारखें पाणीपाणी होईल. ९ अमलदारांचें लोकांशीं हें
बोलणें संपल्यावर लोकांवर सेनानायक नेमावें.

१० युद्ध करावयास तूं एकाद्या नगरानजीक जाशील
तेव्हां सल्ल्याचें बोलणें करून पाहा. ११ त्यांनीं सल्ल्याचें
बोलणें कबूल करून वेस उघडली तर त्या नगरांत
जे सर्व लोक सांपडतील ते तुझे बिगारकाम करणारे
व दास होतील. १२ ते सल्ला न करितां तुम्हांशीं
लढूं लागले तर त्या नगरास वेढा घालावा. १३ तुझा
देव परमेश्वर तें नगर तुझ्या हातीं देईल तेव्हां
त्यांतल्या सर्व पुरुषांस तरवारीनें मारून टाकावें;
१४ पण स्त्रिया, मुलें, जनावरें आदिकरून जी लूट
त्या नगरांत सांपडेल ती आपल्यासाठीं घ्यावी; तुझा
देव परमेश्वर तुला तुझ्या शत्रूंकडील लूट देईल तिचा
उपभोग घे. १५ जीं नगरें तुझ्यापासून फार दूर
असून या राष्ट्रांचीं नसतील त्यासंबंधानें हा प्रकार
करावा; १६ पण तुझा देव परमेश्वर या लोकांचीं जीं
नगरें तुला वतन करून देत आहे त्यांतला कोणताहि
प्राणी जीवंत ठेवूं नको. १७ तुझा देव परमेश्वर
यानें तुला आज्ञा दिल्याप्रमाणें हित्ती, अमोरी, कनानी,
परिज्जी, हिव्वी व यबूसी यांचा निखालस संहार कर;
१८ न केल्यास ते आपआपल्या देवांची पूजा
करितांना जीं अमंगळ कृत्यें करितात त्यांसारखीं
करावयास ते तुम्हांस शिकवितील, असें झाल्यास
तुमचा देव परमेश्वर याजविरुद्ध तुम्हांकडून पाप घडेल.

१९ युद्ध करीत असतां एकाद्या नगराला तूं फार
दिवस वेढा घालून राहिलास तर त्या नगरांतील
झाडांवर कुऱ्हाड चालवून त्यांचा नाश करूं नको;
तीं तोडूं नको; कारण त्यांचीं फळें तुला खावयास
मिळतील. मैदानांतल्या वृक्षांना वेढा द्यावा अशीं तीं
माणसें आहेत काय? २० ज्या वृक्षांला खाण्याजोगीं
फळें येत नाहींत असें तुला दिसून येईल ते तोडून
त्यांचा नाश करून टाकावा; आणि तें नगर हस्तगत
होईपर्यंत त्यावर मोर्चे लावावे.

२१ १ तुझा देव परमेश्वर जो देश तुला वतन
करून देत आहे त्यांतल्या एकाद्या मैदानांत
कोणीं मनुष्य मारून टाकलेला सांपडला आणि
त्यास कोणीं मारिलें हें कळलें नाहीं, २ तर तुझ्यांतील
वडील मंडळी व न्यायाधीश यांनीं बाहेर निघून त्या
प्रेताच्या सभोवार असलेल्या प्रत्येक गांवाचें अंतर
मोजावें; ३ मग जो गांव त्या प्रेताच्या अगदीं जवळचा
असेल त्यांतल्या वडील मंडळींनीं, जी कधीं कामास
लाविली नाहीं अथवा जीवर कधीं जूं ठेविलें नाहीं
अशी कालवड घ्यावी; ४ आणि ज्यांत नांगरणी-
पेरणी होत नाहीं व ज्यांत पाणी सतत वाहत असतें
असें खोरें पाहून त्या नगराच्या वडील मंडळींनीं ती
कालवड तेथें न्यावी आणि त्या खोऱ्यांत तिची मान
मोडावी; ५ तेव्हां लेवी वंशांतल्या याजकांनीं जवळ
असावें; कारण त्यांनीं तुझा देव परमेश्वर याची सेवा
करावी, त्याच्या नांवानें आशीर्वाद द्यावा, आणि
त्यांच्या म्हणण्याप्रमाणें हरएक भांडणाचा किंवा मारा-
मारीचा निर्णय व्हावा, यासाठीं देवानें त्यांस निवडिलें
आहे. ६ मग त्या मारून टाकिलेल्या मनुष्यापासून
अगदीं जवळचें नगर असेल तेथल्या वडील मंडळीनें
त्या खोऱ्यांत मान मोडून टाकिलेल्या कालवडीवर
आपले हात धुवावे. ७ आणि म्हणावें, आमच्या या
हातांनीं हा रक्तपात केला नाहीं आणि आमच्या
डोळ्यांदेखत हा झालेला नाहीं; ८ हे परमेश्वरा, ज्यांस
तूं उद्धरिलें आहे त्या तुझ्या इस्राएल लोकांस क्षमा
कर; तुझ्या इस्राएल लोकांस निरपराध हत्येचा दोष
राहूं देऊं नको. मग त्यांजवरील रक्तपाताच्या दोषाचें
निरसन होईल. ९ या प्रकारें परमेश्वराच्या दृष्टीनें जें
योग्य आहे तें करून निरपराध हत्येचा दोष तूं
आपल्यांतून दूर करावा.

१० तूं आपल्या शत्रूंबरोबर युद्ध करावयास जाशील
आणि तुझा देव परमेश्वर त्यांस तुझ्या हातीं देईल
आणि तूं त्यांस पाडाव करून नेशील, ११ तेव्हां पाडाव
केलेल्या लोकांत एकादी सुंदर स्त्री पाहून तिला तूं
मोहित झालास आणि तिला बायको करून घेण्याची

तुला इच्छा झाली; १२ तर तूं तिला आपल्या घरीं
घेऊन जावें आणि तिचें शीर मुंडावें आणि तिचीं नखें
कांढावीं; १३ तिनें आपल्या परस्वाधीन स्थितींतलीं
आपलीं वस्त्रें टाकून तुझ्या घरीं एक महिनाभर आपल्या
आईबापांसाठीं शोक करावा; यानंतर तूं तिच्याशीं
समागम कर म्हणजे तूं तिचा पति होशील व ती
तुझी पत्नी होईल. १४ ती तुला आवडली नाहीं
तर तिला वाटेल तिकडे जाऊं दे; तिच्याबद्दल पैसा
घेऊन तिला विकूं नये; तूं तिला भ्रष्ट केल्यामुळें तिजवर
धनीपणा चालवूं नको.

१५ कोणा पुरुषास एक आवडती व एक नावडती
अशा दोन बायका असल्या आणि त्या आवडत्या व
त्या नावडत्या दोघींसहि त्याजपासून पुत्र झाले असले
आणि नावडतीचा पुत्र ज्येष्ठ असला, १६ तर तो
आपल्या पुत्रांस आपली संपत्ति वांटून देईल तेव्हां
नावडतीचा पुत्र खरोखर ज्येष्ठ असून जीवंत असला
तर आवडतीच्या पुत्रास ज्येष्ठत्वाचा हक्क देण्यास त्याला
अधिकार नाहीं. १७ नावडतीच्या पुत्राचा ज्येष्ठत्वाचा
हक्क कबूल करून त्यानें त्यास सर्व धनाचा दुप्पट वांटा
द्यावा; तो त्याच्या पौरुषाचें प्रथम फल आहे; ज्येष्ठ-
त्वाचा हक्क त्याचाच आहे.

१८ कोणा मनुष्यास हट्टी आणि दांडगा मुलगा
असून त्याला शासन केलें असतांहि आपल्या आई-
बापांची आज्ञा तो मानीत नाहीं अथवा त्यांचें ऐकत
नाहीं, १९ तर त्याच्या आईबापांनीं त्यास धरून
नगराबाहेर वेशीजवळ नगरच्या वडील मंडळीसमोर
नेऊन २० त्यांस सांगावें, हा आमचा पुत्र हट्टी
व दांडगा आहे, हा आमचें सांगणें जुमानीत नाहीं, हा
खादाड व मद्यपी आहे. २१ यावर त्याच्या गांवच्या
सर्व पुरुषांनीं त्यास दगडमार करून ठार मारावें;
या प्रकारें तूं आपल्यामधून असली दुष्टाई दूर करावी,
म्हणजे सर्व इस्राएल लोक हें ऐकून दहशत पावतील.
२२ कोणा मनुष्यानें मरणदंडास योग्य असें कांहीं पाप
केलें आणि त्यास मृत्यूची शिक्षा होऊन झाडावर फाशीं
दिलें, २३ तर त्याचें शरीर रात्रभर त्या झाडावर
टांगलेलें राहूं देऊं नये, त्याच दिवशीं त्याला अवश्य
पुरावें; कारण फासावर चढविलेल्या मनुष्यावर देवाचा
शाप असतो; तुझा देव परमेश्वर जो देश तुला वतन
करून देत आहे तो विटाळवूं नको.

२२ १ आपल्या एकाद्या बांधवाचे गाईबैल
अथवा शेरडेंमेंढरें चुकार फिरत असलेलीं पाहून
तीं न पाहिल्यासारखें करूं नको; तीं अवश्य त्याज-
कडे पोंचतीं कर; २ तुझा बांधव जवळपास राहत नसला
अथवा तूं त्याला ओळखीत नसलास तर तें जनावर
आपल्या घरीं आण, आणि तुझा बांधव तें मागावयास
येईपर्यंत तें तुझ्यापाशीं ठेव, आणि तो सांपडल्यावर
तें त्याच्या हवालीं कर. ३ त्याप्रमाणेंच आपल्या
बांधवाचें गाढव, त्याचें वस्त्र अथवा कोणतीहि वस्तु
हरवली असून तुला सांपडली तर तिच्यासंबंधानेंहि
असेंच कर; ती पाहून न पाहिल्यासारखें करूं नको.

४ आपल्या बांधवाचें गाढव अथवा बैल वाटेंत
पडलेला पाहून न पाहिल्यासारखें करूं नको; त्याला
उठवून उभा करण्याच्या कामीं अवश्य हात लाव.

५ कोणा स्त्रीनें पुरुषाचा पेहराव लेऊं नये; कोणा
पुरुषानें स्त्रीचा पेहराव लेऊं नये; तुझा देव परमेश्वर
यास तसें करणाऱ्याचा वीट आहे.

६ वाटेनें चालतांना वृक्षावर अथवा जमिनीवर
पक्ष्याचें कोटें तुला आढळलें, मग त्यांत पिलें असोत
किंवा अंडीं असोत; त्या पिलांवर अथवा अंड्यांवर
मादी बसलेली असली तर तिला पिलांसहित धरूं
नको. ७ तुला हवीं असलीं तर पिलें घेऊन जा,
पण त्यांच्या आईस अवश्य सोडून दे; म्हणजे तुझें
कल्याण होईल आणि तूं चिरायु होशील.

८ तूं नवें घर बांधशील तेव्हां धाब्याला मुंढेर
बांध, नाहीं तर कोणी मनुष्य तेथून खालीं पडल्यास
तूं आपल्या घराण्यावर हत्येचा दोष आणिशील.
९ आपल्या द्राक्षमळ्यांत दोन जातींचें बीं मिसळून पेरूं
नको, पेरिलेंस तर पेरिलेल्या बियांचा आणि द्राक्षवेलींचा
उपज हीं दोन्ही पवित्र कार्यासाठीं जप्त करण्यांत येतील.
१० बैल व गाढव यांची जोडी जुंपून जमीन

नांगरूं नको. ११ लोकर व सण यांच्या मिसळीचें
कापड वापरूं नको.

१२ आपल्या अंगावरील वस्त्राच्या चारी कोपऱ्यांस
गोंडे लाव.

१३ कोणा पुरुषानें एकाद्या स्त्रीशीं लग्न केलें व
तिजशीं समागम केल्यावर ती त्याला आवडली नाहीं,
१४ आणि त्यानें त्या स्त्रीवर भलभलते आरोप ठेवून
तिची बदनामी करून म्हटलें कीं मी या स्त्रीचें
पाणिग्रहण करून तिजशीं गमन केलें तेव्हां तिच्या
ठायीं मला कौमार्यचिन्हें आढळलीं नाहींत; १५ तर
मुलीच्या आईबापांनीं तिच्या कौमार्यावस्थेविषयींचीं
चिन्हें घेऊन नगरच्या वडील मंडळीकडे वेशींत जावें.
१६ मुलीच्या बापानें वडील जनांस म्हणावें, मीं
आपली कन्या या पुरुषास दिली आणि आतां ती
त्याला आवडत नाहीं; १७ पाहा, तो तिजवर भल-
भलते आरोप करून म्हणतो कीं तुझ्या कन्येच्या ठायीं
कौमार्यचिन्हें मला आढळलीं नाहींत; पण माझ्या
मुलीच्या कौमार्याचीं चिन्हें हीं पाहा. मग त्या माता-
पितरांनीं ती चादर नगरच्या वडील जनांपुढें पसरावी;
१८ आणि नगरच्या वडील जनांनीं त्या मनुष्यास धरून
शिक्षा करावी; १९ त्याजपासून शंभर शेकेल रुपें
दंडादाखल घेऊन मुलीच्या बापास द्यावें, कारण त्यानें
इस्राएलकन्येची बदनामी केली; त्यानें तिला बायको
म्हणून नांदविलें पाहिजे, तिचा त्याग त्यानें आमरण
करितां कामा नये. २० तरी पण त्या मुलीच्या ठायीं
कौमार्यचिन्हें दिसून आलीं नाहींत हें खरें असलें
२१ तर त्यांनीं त्या मुलीस तिच्या बापाच्या घराबाहेर
काढावें आणि गांवच्या लोकांनीं तिला मरे तों
दगडमार करावा, कारण तिनें आपल्या पितृगृहीं
व्यभिचार करून इस्राएल लोकांत भ्रष्टाचार केला आहे;
याप्रमाणें तूं आपल्यामधून असली दुष्टाई दूर करावी.

२२ कोणी पुरुष विवाहित स्त्रीशीं कुकर्म करितांना
सांपडला तर तिच्यापाशीं निजलेला तो पुरुष व ती
स्त्री या दोघांसहि जिवें मारावें; अशा प्रकारें इस्राएलां-
तून दुष्टाई दूर करावी.

२३ वाग्दत्त कुमारी कोणा पुरुषास नगरांत आढळली
आणि त्यानें तिजशीं कुकर्म केलें, २४ तर त्या दोघांस
धरून नगराच्या वेशीबाहेर न्यावें आणि दगडमार करून
जिवें मारावें; ती नगरांत असून तिनें ओरड केली
नाहीं म्हणून तिला, आणि पुरुषास मारावयाचें तें
यासाठीं कीं त्यानें आपल्या शेजाऱ्याची स्त्री भ्रष्ट केली;
याप्रकारें तूं आपल्यामधून दुष्टाई दूर कर.

२५ वाग्दत्त कुमारी कोणा पुरुषास रानांत
आढळली आणि त्यानें तिजवर बलात्कार करून तिजशीं
कुकर्म केलें तर त्या कुकर्म करणाऱ्या पुरुषास मात्र
जिवें मारावें; २६ पण त्या कुमारीला कांहीं करूं
नये, प्राणदंडास योग्य असें कांहीं पातक तिला
लागत नाहीं. कोणी आपल्या शेजाऱ्यावर उठून
त्यास जिवें मारतो तसाच हा प्रकार समजावा;
२७ कारण ती वाग्दत्त कन्या त्याला रानांत आढ-
ळली तेव्हां ती ओरडली असेल, पण तिचा बचाव
करण्यास कोणी नसेल.

२८ वाग्दत्त नाहीं अशी कुमारी जर कोणा
पुरुषास आढळली व त्यानें तिला धरून तिजशीं कुकर्म
केलें आणि तीं सांपडलीं, २९ तर ज्या पुरुषानें
तिजशीं कुकर्म केलें त्यानें मुलीच्या बापास पन्नास
शेकेल रुपें द्यावें आणि ती त्याची बायको व्हावी;
कारण त्यानें तिला भ्रष्ट केलें आहे, त्यानें आमरण
तिचा त्याग करितां कामा नये.

३० कोणीं आपल्या पित्याच्या स्त्रीशीं विवाह करूं
नये; आपल्या बापाचा पदर उघडा करूं नये.

२३ १ जो भग्नांड आहे अथवा छिन्नलिंग
आहे त्यानें परमेश्वराच्या मेळ्यास येऊं नये.

२ अगम्यागमनानें जन्म पावलेल्या मनुष्यानें
परमेश्वराच्या मेळ्यास येऊं नये; दहाव्या पिढीपर्यंत
त्याच्या वंशांतल्या कोणींहि परमेश्वराच्या सभेस येऊं नये.

३ अम्मोनी आणि मवाबी यांनीं परमेश्वराच्या मेळ्यास
येऊं नये; त्यांच्या दहाव्या पिढीपर्यंत त्यांच्यांतल्या
कोणींहि कधींच परमेश्वराच्या मेळ्यास येऊं नये;
४ कारण तुम्ही मिसराहून निघून येत असतां ते अन्न-

पाणी घेऊन तुमच्या भेटीस आले नाहींत, येवढेंच नव्हे
तर अराम-नहराईम ( मेसोपटेम्या ) प्रांतांतल्या पथोर
नगराचा बौरपुत्र बलाम यास द्रव्य देऊन तुला शाप
द्यावयासाठीं त्यांनीं आणिलें. ५ तरी तुझा देव परमेश्वर
यानें बलामाचें ऐकलें नाहीं, पण उलट तुझा देव परमेश्वर
यानें शापाच्या ऐवजीं तुला आशीर्वादच देवविला;
कारण तुझा देव परमेश्वर याची तुजवर प्रीति होती.
६ तूं त्यांचें क्षेमकुशल आपल्या हयातींत कधींहि
चिंतूं नको.

७ अदोम्याचा तुला वीट नसावा, कारण तो तुझा
बंधु होय; मिसऱ्याचा तुला वीट नसावा; कारण तूं
त्यांच्या देशांत उपरी होतास. ८ त्यांच्या तिसऱ्या
पिढींत जन्मलेल्या लोकांस परमेश्वराच्या मेळ्यास
येण्याची परवानगी आहे.

९ शत्रूंशीं लढाई करण्यासाठीं बाहेर पडून तूं तळ
देशील तेव्हां हरएक दुष्कृत्यापासून दूर राहा. १० जर
कोणा पुरुषास रात्रीं कांहीं अशुद्धता आपोआप प्राप्त
झाली तर त्यानें छावणीबाहेर जावें, त्यानें छावणीच्या
आंत येऊं नये; ११ पण संध्याकाळ जवळ आला
म्हणजे त्यानें स्नान करावें आणि सूर्यास्तानंतर छावणींत
यावें. १२ तुला बहिर्दिशेस जाण्यासाठीं छावणीच्या
बाहेर एक जागा असावी; १३ आणि तुझ्या हत्यारां-
मध्यें एक कुदळ असावी, आणि तूं बहिर्दिशेस
बसून उठल्यावर कुदळीनें खणून आपला मळ
झाकून टाकावा; १४ कारण तुझा देव परमेश्वर
तुझा बचाव करण्यासाठीं आणि शत्रु तुझ्या हातीं
देण्यासाठीं छावणींत इकडून तिकडे फिरत असतो,
यास्तव तूं आपली छावणी पवित्र ठेवावी, नाहीं
तर तुझ्या छावणींत एकादी अमंगळ वस्तु पाहून
तो निघून जाईल.

१५ कोणी दास आपल्या धन्याकडून पळून तुला
शरण आला तर त्यास त्याच्या धन्याच्या हवालीं
करूं नको; १६ त्यानें तुझ्या वाटेल त्या नगराच्या
वेशींच्या आंत तुझ्याबरोबर तुझ्या लोकांमध्यें राहावें;
त्याला जाच करूं नको.

१७ कोणीहि इस्राएलकन्येनें वेश्या होऊं नये;
कोणाहि इस्राएलपुत्रास पुंमैथुनास वाहूं नये.
१८ वेश्येच्या कमाईचा किंवा कुत्र्याच्या कमाईचा
पैसा नवस फेडण्यासाठीं कोणींहि आपला देव परमेश्वर
याच्या मंदिरांत आणूं नये; कारण या दोन्ही गोष्टींचा
तुझा देव परमेश्वर यास वीट आहे.

१९ आपल्या बांधवांशीं वाढीदिढीचा व्यवहार
करूं नको; पैसा, खाण्याचे पदार्थ किंवा दुसरी
कोणतीहि वस्तु यांची वाढीदिढी करूं नको; २० परदे-
शीयाशीं पाहिजे तर वाढीदिढीचा व्यवहार कर, पण
आपल्या बांधवाशीं करूं नको, म्हणजे जो देश वतन
करून घेण्यास तूं जात आहेस तेथें ज्या ज्या कामास
तूं हात घालिशील त्यांत तुझा देव परमेश्वर तुला
बरकत देईल.

२१ तूं आपला देव परमेश्वर यास नवस करिशील
तेव्हां तो फेडण्यास विलंब लावूं नको; कारण तुझा
देव परमेश्वर तुजपासून त्याचा झाडा अवश्य घेईल,
विलंब लाविल्यास तुला पाप लागेल. २२ तूं नवस
केला नाहीं तर तेणेंकरून तुला कांहीं पाप लागावयाचें
नाहीं. २३ तुझ्या तोंडून निघालेलें वचन मान्य करून
पाळ; म्हणजे तूं आपला देव परमेश्वर यास स्वसंतोषाचें
अर्पण करण्याचा नवस केल्यास आपल्या तोंडानें
दिलेल्या वचनाप्रमाणें कर.

२४ आपल्या शेजाऱ्याच्या द्राक्षांच्या मळ्यांत
गेलास तर मनमुराद द्राक्षें खा, पण आपल्या पात्रांत
कांहीं ठेवूं नको.

२५ आपल्या शेजाऱ्याच्या उभ्या पिकांत तूं गेलास
तर आपल्या हातानें हवीं तर कणसें तोड; पण
आपल्या शेजाऱ्याच्या त्या उभ्या पिकास विळा
लावूं नको.

२४
१ कोणा पुरुषानें एकाद्या स्त्रीशीं लग्न केल्यावर
तिच्यांत कांहीं दोष त्याला दिसून आल्यामुळें
ती त्याला आवडली नाहीं, तर त्यानें सूटपत्र
लिहून तिच्या हातीं द्यावें आणि तिला आपल्या घरा-
बाहेर घालवावें. २ ती त्याच्या घरून बाहेर निघाल्यावर

तिनें पाहिजे तर दुसऱ्याची व्हावें; ३ पण त्या दुसऱ्या पुरुषाची तिजवर इतराजी होऊन त्यानेंहि सूटपत्र लिहून तिच्या हातीं दिलें व तिला घराबाहेर घालविलें, किंवा तिजशीं लग्न केलेला हा दुसरा नवरा मेला, ४ तर घालवून देणाऱ्या तिच्या पहिल्या नवऱ्यानें ती भ्रष्ट झाल्यावर तिला पुनः बायको करूं नये; परमेश्वराला या गोष्टीचा वीट आहे; तुझा देव परमेश्वर जो देश तुला वतन करून देत आहे त्या देशाला पापदोष लागण्यास कारण होऊं नको.

५ कोणा पुरुषाचें नुकतेंच लग्न झालें असल्यास त्यानें सैन्याबरोबर मोहिमेवर जाऊं नये; अथवा कांहीं कामगिरी त्याच्यावर टाकण्यांत येऊं नये; त्यानें वर्षभर आपलें घरदार पाहण्यास मोकळें राहावें आणि वरिलेल्या नववधूला रंजवावें. ६ जातें किंवा जात्याची वरची तळी कोणीं गहाण ठेवूं नये; असें करणें म्हणजे मनुष्याचें जीवितच गहाण ठेवणें होय.

७ आपल्या एकाद्या इस्राएल बांधवास आपली मत्ता म्हणून चोरून नेऊन विकितांना कोणी सांपडला तर त्यानें प्राणास मुकावें; या प्रकारें तूं आपल्यामधून असलें दुष्कर्म दूर करावें.

८ महारोगाच्या व्याधीसंबंधानें संभाळा; लेवीय याजक तुम्हांस जें शिकवितील तें सर्व लक्षांत घेऊन त्याप्रमाणें जपून कृति करा; मीं त्यांस आज्ञा दिली आहे ती लक्षांत घेऊन पाळा. ९ तुम्ही मिसरांतून निघाल्यावर तुझा देव परमेश्वर यानें मार्गांत मिर्यामेचें काय केलें त्याचें स्मरण ठेवा.

१० आपल्या शेजाऱ्यास तूं कांहीं कर्ज दिलें तर त्याजबद्दल हडप आणावयासाठीं त्याच्या घरांत शिरूं नको. ११ तूं बाहेर उभें राहावें आणि ज्यास तूं कर्ज दिलें असेल त्यानें त्याजबद्दलचें हडप तुजकडे बाहेर आणावें. १२ तो मनुष्य कंगाल असला तर त्याचें हडप अंगावर घेऊन निजूं नको; १३ सूर्य खालीं जातांजातां त्याचें हडप त्याला अवश्य परत द्यावें म्हणजे तो आपलें तें वस्त्र अंगावर घेऊन निजेल आणि तुझें अभीष्ट चिंतील; आणि तुझा देव परमेश्वर याच्या दृष्टीनें ही तुझी धार्मिकता ठरेल.

१४ तुझ्या बांधवांपैकीं अथवा देशांतील तुझ्या वेशींच्या आंत राहणाऱ्या परदेशीयांपैकीं कोणी मजूर दीन व कंगाल असला तर त्याजवर जुलूम करूं नको; १५ त्याला ज्या दिवसाची मजुरी त्याच दिवशीं दे; कारण तो गरीब असल्यामुळें मजुरीकडे त्याचें चित्त लागलेलें असतें; ती सूर्यास्तापलीकडे ठेवूं नको, ठेविली तर तो तुझ्याविषयीं परमेश्वराकडे गाऱ्हाणें करील आणि तुला पाप लागेल.

१६ मुलांकरितां बापास जिवें मारूं नये अथवा बापाकरितां मुलांस जिवें मारूं नये; जो पाप करील त्यालाच त्याच्या पापास्तव जिवें मारावें.

१७ कोणा परदेशीयाचा अथवा अनाथाचा न्याय विपरीत करूं नको; कोणा विधवेचें वस्त्र गहाण घेऊं नको. १८ तूं मिसर देशांत दास होतास आणि तुझा देव परमेश्वर यानें तुला तेथून सोडविलें याचें स्मरण ठेव; म्हणूनच असें करण्याची मी तुला आज्ञा देत आहें.

१९ तूं आपलें पीक कापिशील तेव्हां शेतांत एकादी पेंढी चुकून राहिली तर ती आणण्यास परत जाऊं नको; उपरी, अनाथ अथवा विधवा यांच्यासाठीं ती पडूं दे, म्हणजे तुझा देव परमेश्वर तुझ्या हातच्या सर्व कामास बरकत देईल.

२० तूं आपले जैतूनवृक्ष झोडिशील तेव्हां एकदा झोडिलेली खांदी पुन्हां झोडूं नको; ती उपरी, अनाथ व विधवा यांच्यासाठीं राहावी. २१ आपल्या द्राक्षमळ्यांतलीं द्राक्षं खुडिशील तेव्हां राहिलेलीं पुन्हां तोडूं नको; तीं उपरी, अनाथ व विधवा यांच्यासाठीं राहावीं. २२ तूं मिसर देशांत दास होतास याचें स्मरण ठेव; म्हणूनच असें करण्याची मी तुला आज्ञा देत आहें.

२५ १ लोकांचा कांहीं वाद उपस्थित झाला आणि ते न्याय मागण्यासाठीं आले तर न्यायाधीशांनीं त्यांचा निवाडा करावा; जे निर्दोषी असतील त्यांस त्यांनीं निर्दोषी ठरवावें, आणि दोषी असतील त्यांस दोषी ठरवावें; २ अपराधी मनुष्य फटके खाण्यास लायक ठरला तर न्यायाधीशानें

त्याला खालीं पाडवून आपल्यासमक्ष त्याच्या अपराधा-
प्रमाणें मोजून फटके मारवावे. ३ त्यास चाळीसपर्यंत
फटके मारावे, अधिक मारूं नयेत; ह्या मर्यादेबाहेर
जाऊन त्याला जास्त फटके मारिले तर तुझ्या बांधवाची
तुझ्यादेखत अप्रतिष्ठा होईल.

४ मळणी करितांना बैलास मुसकें घालूं नको.

५ भाऊभाऊ एकत्र राहत असले आणि त्यांपैकीं
एक निपुत्रिक मेला तर त्याच्या विधवेनें बाहेरल्या
कोणाशीं लग्न करूं नये; तिच्या दिरानें तिजशीं
गमन करून तिला बायको करावें, व तिजशीं दिराला
अनुरूप असा धर्म आचरावा. ६ त्या स्त्रीस जो पहिला
पुत्र होईल त्यानें त्या मयत झालेल्या बंधूचें नांव चालवावें
म्हणजे इस्राएलांतून तो नामशेष होणार नाहीं.
७ आपल्या भावजयीशीं लग्न करण्याची त्या पुरुषाची
इच्छा नसली तर तिनें नगराच्या वेशीपाशीं वडील
मंडळीकडे जाऊन म्हणावें कीं आपल्या बंधूचें नांव
इस्राएल लोकांत चालविणारा निर्माण करण्यास माझा
दीर कबूल नाहीं आणि मजशीं दिराच्या धर्मानें
वागावयाची त्याची इच्छा नाहीं. ८ मग नगरांतील
वडील मंडळीनें त्यास बोलावून आणून समजावून
सांगावें; तो आपलाच हेका चालवून म्हणाला कीं,
हिजशीं लग्न करण्याची माझी इच्छा नाहीं, ९ तर
त्याच्या भावजयीनें वडील मंडळीदेखत त्याच्याजवळ
येऊन त्याच्या पायांतलें पायतण काढावें आणि त्याच्या
तोंडावर थुंकून म्हणावें, जो कोणी आपल्या बंधूचें
घराणें चालवूं इच्छीत नाहीं त्याचें याप्रमाणें करावें.
१० पायतण काढलेल्या पुरुषाचें घराणें असें त्या
पुरुषाचें नांव इस्राएल लोकांत पडेल.

११ पुरुषपुरुष मारामारी करीत असतां त्यांपैकीं
एकाची स्त्री त्याला मारणाऱ्याच्या हातून सोडविण्या-
साठीं जवळ जाऊन व आपला हात पुढें करून त्याचें
गुह्यांग पकडील, १२ तर त्या स्त्रीचा हात कापून
टाकावा; तिजवर दयादृष्टि करूं नये.

१३ तुझ्या थैलींत अधिक व उणीं अशीं दोन
प्रमाणांचीं वजनें ठेवूं नको. १४ तुझ्या घरीं अधिक व
उणीं अशीं दोन प्रमाणांचीं मापें ठेवूं नको. १५ तुझीं
वजनें यथायोग्य व पुरीं असावीं, तुझीं मापें यथायोग्य
व पुरीं असावीं, म्हणजे जो देश तुझा देव परमेश्वर
तुला देत आहे त्यांत तूं चिरकाळ राहशील. १६ जे
असलीं कामें करून अधर्मानें वागतात त्या सर्वांचा
तुझा देव परमेश्वर यास वीट आहे.

१७ तुम्ही मिसर देशांतून बाहेर निघालां तेव्हां
वाटेनें अमालेक तुजशीं कसा वागला याचें स्मरण
कर; १८ वाटेनें चालून तूं दमलेलाथकलेला असतां
त्यानें देवाचें भय सोडून थकून मागें पडलेल्या तुझ्या
सगळ्या लोकांवर हल्ला करून त्यांस मारिलें. १९ यास्तव
तुझा देव परमेश्वर जो देश तुला वतन करून देईल
त्यांत चोहोंकडल्या शत्रूंपासून तुझा देव परमेश्वर यानें
तुला विश्राम दिल्यावर अमालेकाची पृथ्वीतलावरून
आठवण बुजवून टाक; हें तूं विसरूं नको.

२६ १ तुझा देव परमेश्वर जो देश तुला वतन
करून देत आहे त्यांत पोहंचल्यावर तूं त्याचा
ताबा घेऊन त्यांत वस्ती करिशील, २ आणि
तुझा देव परमेश्वर तुला जो देश देत आहे त्यांतील
जमिनीचें हरतऱ्हेचें प्रथम उत्पन्न तूं आपल्या घरीं
आणिशील तेव्हां त्यांतलें कांहीं पाटींत घालून तुझा देव
परमेश्वर यानें आपल्या नामाच्या निवासार्थ निवडि-
लेल्या स्थलीं घेऊन जा. ३ आणि त्या समयीं जो
याजक असेल त्याच्याकडे जाऊन त्यास येणेंप्रमाणें
बोल; तुझा देव परमेश्वर याजपुढें मी प्रतिज्ञा करितों
कीं परमेश्वरानें आम्हांस जो देश देण्याविषयीं आमच्या
पूर्वजांशीं आणभाक केली होती त्यांत मी येऊन
पोहंचलों आहें. ४ मग याजकानें तुझ्या हातून ती
पाटी घेऊन तुझा देव परमेश्वर याच्या वेदी-
समोर ठेवावी. ५ तेव्हां तूं आपला देव परमेश्वर
याच्यासमक्ष असें म्हण : माझा मूळपुरुष एक अरामी
मनुष्य होता; तो नष्ट होण्याच्या लागास आला तेव्हां
तो आपला लहानसा परिवार घेऊन मिसर देशांत
गेला व तेथें उपरी म्हणून राहिला; त्याजपासून तेथें
एक महान्, सामर्थ्यवान् व संख्येनें मोठें असें राष्ट्र उत्पन्न

झालें; ६ तेथें मिसरी लोकांनीं आम्हांस वाईट प्रकारें वागवून गांजिलें व आम्हांवर बिकट दास्य लादिलें; ७ पण आम्हीं आमच्या पूर्वजांचा देव परमेश्वर याचा धावा केला तेव्हां त्यानें आमची आरोळी ऐकली, आणि आमचें दुःख, कष्ट, व छळणूक हीं पाहिलीं; ८ तेव्हां परमेश्वरानें समर्थ बाहूनें व हात उगारून आणि भयंकर उत्पात व चमत्कार दाखवून आम्हांस मिसर देशांतून बाहेर आणिलें; ९ आणि आम्हांस या स्थलीं आणून पोंचविलें व दुधामधाचे प्रवाह ज्यांत वाहत आहेत असा हा देश आम्हांस दिला. १० यास्तव, हे परमेश्वरा, पाहा, जमिनीचा जो प्रथम उपज मला तूं दिला आहे तो मीं तुला आणिला आहे. मग तूं आपला देव परमेश्वर याजसमोर ती पाटी ठेवून त्याला दंडवत घाल; ११ तुझा देव परमेश्वर ज्या उत्तमउत्तम वस्तु तुला व तुझ्या घराण्याला देईल त्यांचा तूं, लेवी व आपल्यामध्यें राहणारे परदेशीय यांजसह, आनंदानें उपभोग घे.

१२ तिसरें वर्ष जें दशमांश देण्याचें वर्ष ठरलें आहे त्यांत तूं आपल्या उत्पन्नाचा सगळा दशमांश निराळा काढिल्यावर तो लेवी, परदेशीय, अनाथ व विधवा यांस दे म्हणजे तीं तुझ्या वेशींच्या आंत तो खाऊन तृप्त होतील; १३ मग तूं आपला देव परमेश्वर यास असें म्हण: तूं मला लावून दिलेल्या सगळ्या धर्मशास्त्रास अनुसरून पवित्र ठरलेल्या वस्तु मीं आपल्या घरांतून बाहेर काढून लेवी, परदेशीय, अनाथ व विधवा यांस दिल्या आहेत; मीं तुझ्या कोणत्याहि आज्ञेचें उल्लंघन केलें नाहीं, ती विसरलों नाहीं; १४ मीं सुतकी असतां यांतली कोणतीहि वस्तु खाल्ली नाहीं, अथवा अशुचि असतां यांतल्या कांहीं वस्तु घराबाहेर काढिल्या नाहींत; अथवा मयतांकरितां त्यांतल्या कांहीं दिल्या नाहींत; मीं आपला देव परमेश्वर याचा शब्द मानिला आहे; मी तुझ्या सर्व आज्ञांप्रमाणें वर्तलों आहें. १५ तूं आपल्या पवित्र स्वर्गधामाहून अवलोकन कर, आपल्या इस्राएल प्रजेस बरकत दे आणि तूं आमच्या पूर्वजांशीं प्रतिज्ञा केल्याप्रमाणें जो देश तूं आम्हांस दिला आहे त्या ह्या दुधामधाचे प्रवाह वाहणाऱ्या देशास बरकत दे.

१६ हे विधि व नियम तूं पाळावे अशी आज्ञा आज तुझा देव परमेश्वर तुला करीत आहे म्हणून तूं जिवेंभावें हे मान्य करून पाळ. १७ परमेश्वर हा आपला देव आहे अशी प्रतिज्ञा करून तूं आज वचन दिलें आहे कीं तुझ्या मार्गानें मी चालेन, तुझे विधि, आज्ञा व नियम पाळीन आणि तुझा शब्द मानीन; १८ आणि परमेश्वरानेंहि आज प्रतिज्ञापूर्वक तुला सांगितलें आहे कीं तुला पूर्वी वचन दिल्याप्रमाणें तूं माझी खास प्रजा झाला आहेस, तूं माझ्या सर्व आज्ञा पाळाव्या, १९ म्हणजे निर्माण केलेल्या सर्व लोकांकडून तुला प्रशंसा, नांवलौकिक आणि सन्मान या बाबतींत मी श्रेष्ठ करीन आणि माझ्या म्हणण्याप्रमाणें तूं परमेश्वर आपला देव याची पवित्र प्रजा होऊन राहशील.

२७ १ मग इस्राएलाच्या वडील जनांसह मोशानें लोकांस आज्ञा केली कीं, जें धर्मशास्त्र मी आज तुम्हांस लावून देत आहें तें सर्व पाळा. २ तुझा देव परमेश्वर तुला देत आहे त्या देशांत यार्देन उतरून जाऊन तूं पोहंचशील तेव्हां मोठे धोंडे उभे कर, त्यांवर चुन्याचा लेप कर; ३ आणि तूं नदी उतरून जाशील तेव्हां त्या धोंड्यांवर धर्मशास्त्राचीं हीं सर्व वचनें लिहून काढ, म्हणजे जो देश तुझ्या पूर्वजांचा देव परमेश्वर आपल्या वचनास अनुसरून तुला देत आहे व ज्यांत दुधामधाचे प्रवाह वाहत आहेत त्या देशांत तुझा प्रवेश होईल. ४ जे धोंडे उभे करण्याविषयीं मीं आज तुम्हांस आज्ञा दिली आहे ते तुम्हीं यार्देन उतरून गेल्यावर एबाल डोंगरावर उभे करावे व त्यांवर चुना लेपावा; ५ आणि तेथेंच आपला देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ धोंड्यांची एक वेदी बांध; तिला कोणतेंहि लोखंडी हत्यार लावूं नको. ६ तूं आपला देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ न घडलेल्या धोंड्यांची वेदी बांधून तीवर तुझा देव परमेश्वर याजसमोर होमबलींचीं अर्पणें कर. ७ तेथें शांत्यर्पणांचे यज्ञ करून

भोजन कर आणि आपला देव परमेश्वर याच्यासमोर उत्सव कर. ८ त्या धोंड्यांवर धर्मशास्त्राचीं सर्व वचनें चांगलीं स्पष्ट लिहून काढ.

९ मग मोशे आणि लेवीय याजक यांनीं सर्व इस्राएल लोकांस म्हटलें, हे इस्राएला, स्तब्ध राहून ऐकून घे; तूं आज आपला देव परमेश्वर याची प्रजा झाला आहेस; १० म्हणून आपला देव परमेश्वर याचें वचन पाळ आणि ज्या आज्ञा व जे विधि आज मी तुला सांगत आहें त्यांप्रमाणें वाग.

११ मग त्याच दिवशीं मोशानें लोकांस बजावून सांगितलें कीं १२ तुम्ही यार्देन उतरून जाल तेव्हां शिमोन, लेवी, यहूदा, इस्साखार, योसेफ व बन्यामीन यांनीं गरिज्जीम पर्वतावर उभें राहून लोकांस आशीर्वचनें ऐकवावीं; १३ आणि रऊबेन, गाद, आशेर, जबुलून, दान आणि नफताली यांनीं एबाल पर्वतावर उभें राहून शापवचनें उच्चारावीं. १४ तेव्हां लेव्यांनीं सर्व इस्राएल लोकांस पुढीलप्रमाणें दीर्घ स्वरानें म्हणावें:

१५ जो कोणी परमेश्वरास वीट आणणारी कोरींव अथवा ओतींव मूर्ति कारागिराकडून करवून तिची गुप्त रीतीनें स्थापना करितो तो शापित होय; तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

१६ जो आपल्या पित्यास अथवा मातेस तुच्छ मानितो तो शापित होय; तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

१७ जो आपल्या शेजाऱ्याच्या शेताची मेर ढळवितो तो शापित होय; तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

१८ जो अंधळ्यास वाटेवरून बहकवितो तो शापित होय; तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

१९ जो परदेशीय, अनाथ व विधवा यांचा न्याय विपरीत करितो तो शापित होय; तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

२० जो आपल्या सावत्र मातेशीं गमन करितो तो आपल्या पित्याचा पदर उघडा करितो म्हणून तो शापित होय; तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

२१ जो कोणी कोणत्याहि पशूबरोबर गमन करितो तो शापित होय; तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

२२ जो आपल्या सख्ख्या अथवा सावत्र बहिणीशीं गमन करितो तो शापित होय; तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

२३ जो आपल्या सासूशीं गमन करितो तो शापित होय; तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

२४ जो गुप्तपणें आपल्या शेजाऱ्यास ठार मारितो तो शापित होय; तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

२५ जो लांच घेऊन निर्दोष पुरुषास ठार मारितो तो शापित होय; तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

२६ जो हीं धर्मशास्त्राचीं वचनें मान्य करून तीं आचरणांत आणीत नाहीं तो शापित होय; तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणावें.

२८ १ तुझा देव परमेश्वर याची वाणी तूं लक्षपूर्वक ऐकशील आणि ज्या ह्या सर्व आज्ञा आज मी तुला निवेदन करीत आहें त्या मान्य करून पाळिशील तर तो पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांहून तुला उच्च करील; २ तूं आपला देव परमेश्वर याची वाणी ऐकशील तर हीं सर्व वरदानें तुजकडे धाव घेऊन तुला प्राप्त होतील. ३ नगरांत तूं धन्य होशील; शेतापोतांत तूं धन्य होशील. ४ तुझें संतान, तुझ्या भूमीचें उत्पन्न, तुझीं गुरेंढोरें व तुझीं शेरडेंमेंढरें यांचे वत्स धन्य होतील. ५ तुझी टोपली व काथवट ह्या धन्य होतील. ६ तुझें येणेंजाणें धन्य होईल. ७ तुझ्यावर चढाई करून येणारे तुझे शत्रु मार खातील; ते एका वाटेनें तुजवर चढाई करितील पण तुझ्यापुढून सात वाटांनीं पळून जातील, असें परमेश्वर घडवून आणील. ८ तुझ्या धान्याच्या कोठारांस व ज्या ज्या कामास तूं हात घालिशील त्या सर्वांत बरकत येईसें परमेश्वर करील; तुझा देव परमेश्वर जो देश तुला देत आहे त्यांत तो तुझें कल्याण करील. ९ तूं आपला देव परमेश्वर याच्या आज्ञा पाळून त्याच्या मार्गानें चालशील तर तो आपल्या प्रतिज्ञेस अनुसरून तुला आपली पवित्र प्रजा करून स्थिर ठेवील. १० परमेश्वराचें नाम तुला दिलें आहे हें पृथ्वीवरील राष्ट्रें पाहतील तेव्हां त्यांना तुझा धाक वाटेल; ११ आणि जो देश तुला देण्या-

विषयीं परमेश्वरानें तुझ्या पूर्वजांशीं आणभाक केली
त्यांत तुझें संतान, तुझ्या गुरांढोरांचे वत्स व तुझ्या
भूमीचा उपज यांची अभिवृद्धि करून तुझें तो कल्याण
करील: १२ परमेश्वर तुझ्यासाठीं आपलें उत्तम भांडार
जें आकाश तें खुलें करून तुझ्या भूमीवर योग्य ऋतूंत
पर्जन्यवृष्टि करील, तुझ्या हातच्या सर्व कामास बरकत
देईल; तूं बहुत राष्ट्रांस ऋण देशील पण तुला कोणा-
पासून ऋण घ्यावें लागणार नाहीं. १३ परमेश्वर तुला
पुच्छ नव्हे तर मस्तक करील; तूं खालीं नव्हे तर
वर राहशील; तुझा देव परमेश्वर याच्या ज्या आज्ञा
मीं आज तुला निवेदन केल्या त्या चित्त देऊन
ऐकशील व मान्य करून पाळिशील, १४ आणि
ज्या वचनांविषयीं मी तुला आज आज्ञा करीत आहें
त्यांपासून उजवीडावीकडे वळून अन्य देवांच्या मागें
लागणार नाहींस व त्यांची भक्ति करणार नाहींस,
तर असें घडेल.

१५ उलट पक्षीं तूं आपला देव परमेश्वर याचें ऐकणार
नाहींस आणि त्याच्या ज्या सर्व आज्ञा व विधि हीं पाळण्या-
विषयीं मी आज तुला सांगत आहें तीं मान्य करून
पाळणार नाहींस तर हे सर्व पुढील शाप तुजवर
येऊन तुला गांठतील. १६ नगरांत व शेतापोतांत
तुला शाप लागेल. १७ तुझी टोपली व काथवट यांला
शाप लागेल. १८ तुझें संतान, तुझ्या भूमीचा उपज,
तुझीं गुरेंढोरें व शेरडेंमेंढरें यांचे वत्स यांस शाप
लागेल. १९ तुझ्या येण्याजाण्यास शाप लागेल. २० तूं
परमेश्वराचा त्याग करून दुष्कर्म केल्यामुळें ज्या ज्या
कामास हात घालिशील त्यांत परमेश्वर तुला शाप
देईल, तुला घाबरें करील, तुला शासन करील, तें
इतकें कीं तुझा नाश होऊन तूं त्वरित नष्ट होशील.
२१ जो देश वतन करून घ्यावयास तूं जात आहेस
तेथें तूं समूळ नष्ट होईपर्यंत मरी तुला चिकटून राहील
असें परमेश्वर करील. २२ क्षयरोग, ज्वर, दाह, जळ-
जळाट, तरवार, मर्की, भेरड यांच्यायोगें परमेश्वर तुझा
संहार करील आणि तुझा समूळ नाश होईपर्यंत हीं तुझा
पिच्छा पुरविनील. २३ तुझ्या शिरावर आकाश पितळे-
सारखें व तुझ्या पायांखालीं पृथ्वी लोखंडासारखी
होईल. २४ परमेश्वर तुझ्या देशावर पर्जन्याच्या ऐवजीं
वाळूची व धुळीची वृष्टि करील; त्यांचा वर्षाव आकाशांतून
होऊन अंतीं तुझा समूळ नाश होईल. २५ परमेश्वर
शत्रूंकडून तुझा मोड करवील; तूं एका वाटेनें त्यांशीं
सामना करिशील पण सात वाटांनीं तूं त्यांच्या-
पुढून पलायन करिशील आणि पृथ्वीवरील सर्व राष्ट्रां-
राष्ट्रांतून भटकत फिरशील. २६ तुझीं मढीं अंत-
राळांतील सर्व पक्ष्यांस व पृथ्वीवरल्या सर्व पशूंस
भक्ष्य होतील व त्यांस कोणी हाकून देणार नाहीं.
२७ परमेश्वर तुला मिसर देशांतील गळवें, मूळव्याध,
खवडे व खरूज यांची अशी पीडा लावील कीं तूं
बरा व्हावयाचा नाहींस. २८ परमेश्वर तुला वेडा व
अंधळा करील, आणि तुझें मन अतिशयित घाबरेल;
२९ अंधळा जसा अंधारांत चांचपडतो तसा तूं भर-
दुपारीं चांचपडत फिरशील; तुझें कोणतेंहि काम
सफल व्हावयाचें नाहीं. तुझी एकसारखी छळणूक
होईल व तुझी नागवण होईल; तुझा कोणी बचाव
करणार नाहीं. ३० तूं स्त्रीला मागणी घालिशील पण
दुसरा तिचा उपभोग घेईल; तूं घर बांधिशील पण
त्यांत वस्ती करणार नाहींस; तूं द्राक्षांचा मळा लाविशील
पण त्याचें फळ तुला मिळणार नाहीं. ३१ तुझ्यादेखत
तुझा बैल कापितील पण त्याचें मांस तुला खावयास
मिळावयाचें नाहीं. तुझ्यासमक्ष तुझें गाढव हरण
करितील, पण तुला पुनः तें परत मिळावयाचें नाहीं;
तुझीं शेरडेंमेंढरें तुझ्या शत्रूंच्या हातीं लागतील, पण
त्यांस कोणी सोडविणार नाहीं. ३२ तुझे पुत्र व कन्या
दुसऱ्या देशाच्या लोकांच्या हातीं लागतील आणि तुझे
डोळे दिवसभर त्यांची मार्गप्रतीक्षा करितांकरितां थकून
जातील; तुझ्या बाहूंची शक्ति मुळीं चालणार नाहीं.
३३ तुझ्या भूमीचा उपज व तुझें सर्व श्रमफळ तुला
अपरिचित अशा देशाचे लोक खाऊन टाकितील; तुझी
निरंतर छळणूक होऊन तुझा चुराडा होईल; ३४ तूं
आपल्या डोळ्यांनीं त्या गोष्टी पाहून पाहून वेडा
होशील. ३५ परमेश्वर तुझ्या गुडघ्यांस, तंगड्यांस,

किंबहुना तळव्यापासून मस्तकापर्यंत असाध्य फोड
उत्पन्न करून तुला पीडा देईल. ३६ तुला अथवा
तुझ्या पूर्वजांस अपरिचित अशा एका राष्ट्राकडे परमेश्वर
तुला व तूं आपल्यावर नेमिलेल्या राजाला नेईल, आणि
तेथें तूं काष्ठपाषाणाच्या अन्य देवांची भक्ति करिशील;
३७ आणि ज्या ज्या लोकांमध्यें परमेश्वर तुला नेईल
त्या त्या सर्वांस तूं विस्मयाचा, दाखल्याचा व उपहासाचा
विषय होशील. ३८ तूं शेतांत बहुत बीं घेऊन जाशील
पण थोडेंच मळिशील, कारण टोळ तें खाऊन टाकितील.
३९ तूं द्राक्षमळे लावून त्यांची मशागत करिशील;
पण तुला द्राक्षारस प्यावयास मिळावयाचा नाहीं अथवा
द्राक्षेंहि साठविण्यास मिळावयाचीं नाहींत, कारण कीड
तीं खाऊन टाकील. ४० तुझ्या सर्व मुलखांत जैतून-
वृक्ष होतील पण त्यांचें तेल तुला अभ्यंग करावयास
मिळावयाचें नाहीं; कारण त्यांचीं फळें गळून पडतील.
४१ तुला पुत्र व कन्या होतील पण तीं तुला लाभणार
नाहींत; कारण तीं पाडाव होतील. ४२ तुझे सर्व वृक्ष
आणि तुझ्या भूमीचा सर्व उपज यांवर टोळधाड
येईल. ४३ तुझ्यामध्यें राहणारा परदेशीय तुझ्याहून
उन्नत होत जाईल; पण तूं अवनत होत जाशील.
४४ तो तुला ऋण देईल, तुला त्यास ऋण देतां
यावयाचें नाहीं; तो शीर होईल व तूं पुच्छ होशील.
४५ हीं सर्व अरिष्टें तुजवर येऊन पडतील, तीं तुझा पिच्छा
पुरवितील; तुला गांठितील व अखेरीस तुझा निःपात
करितील, कारण तुझा देव परमेश्वर याची वाणी तूं
ऐकली नाहीं व त्यानें दिलेल्या आज्ञा व विधि मान्य
करून तूं पाळिल्या नाहीं. ४६ तुझ्यावर व तुझ्या
संततीवर हीं अरिष्टें निरंतरचीं येऊन चिन्हादाखल व
विस्मयादाखल होतील; ४७ कारण सर्व गोष्टींची विपुलता
असतांना तूं आनंदानें व हर्षानें आपला देव परमेश्वर
याची भक्ति केली नाहीं; ४८ म्हणून तूं भुकेला,
तान्हेला, नग्न आणि सर्व बाबतींत गरजवंत असा
होऊन, ज्या तुझ्या शत्रूंस परमेश्वर तुजवर पाठवील
त्यांचें तुला दास्य करावें लागेल; तुझा निःपात होई-
पर्यंत तो तुझ्या मानेवर लोखंडी जूं ठेवील. ४९ दुरून,
पृथ्वीच्या दिगंताहून गरुडाप्रमाणें झडप घालणारें असें
राष्ट्र परमेश्वर तुजवर आणील; आणि त्याची भाषा
तुला समजावयाची नाहीं; ५० त्या लोकांची मुद्रा
उग्र असेल, ते वृद्धांचा आदर करावयाचे नाहींत
कीं बालकांवर दया करावयाचे नाहींत; ५१ तुझ्या
जनावरांचे वत्स आणि तुझ्या भूमीचा उपज ते अगदीं
खाऊन टाकून तुझा संहार करितील; अन्न, नवा
द्राक्षारस, तेल, वासरें, कोकरें हीं कांहींच तुला राहूं
न देतां ते तुझा नाश करितील; ५२ तुझा देव परमेश्वर
यानें तुला दिलेल्या देशाच्या सर्व वेशींच्या आंत तुला
ते घेरून टाकितील; ज्यांवर तूं भिस्त ठेवणार ते तुझ्या
देशांतील सर्व उंचउंच व मजबूत तट पाडून टाकी-
पर्यंत तुला तुझ्या सर्व वेशींच्या आंत ते कोंडितील.
५३ तुला वेढा पडला असतां व शत्रूनें तुला पेंचांत
धरिलें असतां तुझा देव परमेश्वर यानें तुझ्या पोटीं
दिलेले पुत्र व कन्या यांचें मांस तूं खाशील. ५४ तुझ्यां-
तला जो पुरुष कोमल व अति सुकुमार असेल त्याची-
देखील आपल्या बांधवांवर, प्राणप्रियेवर व आपलीं
वांचून राहिलेलीं अपत्यें यांजवर निष्ठुर दृष्टि होईल.
५५ तो आपल्या अपत्यांचें मांस खाईल; तें
त्यांतल्या कोणास देणार नाहीं; कारण त्यालाच कांहीं
उरावयाचें नाहीं, असा प्रसंग येईल; ५६ आणि
तुझ्यांतील एकादी स्त्री अशी कोमल व सुकुमार असली
कीं ती आपल्या कोमलपणामुळें व सुकुमारपणामुळें
जमिनीला आपल्या पायाचा तळवा लावावयास भिईल
ती देखील आपला प्राणप्रिय पति, पुत्र व कन्या,
५७ आपल्या पोटचा गोळा, आपणास झालेलीं मुलें
यांजकडे निष्ठुर दृष्टि करील; कारण वेढा पडल्यामुळें,
तुझ्या शत्रूनें तुला तुझ्या वेशींच्या आंत कोंडून
मोठ्या पेंचांत धरिल्यामुळें व सर्व वस्तूंची तिला वाण
पडल्यामुळें ती गुप्तपणें आपलीं अपत्यें भक्षील.
५८ परमेश्वर तुझा देव याच्या प्रतापी व भययोग्य
नामाचें भय बाळगावें म्हणून या ग्रंथांत जीं नियम-
शास्त्राचीं वचनें लिहिलीं आहेत तीं मान्य करून तूं
पाळणार नाहींस ५९ तर परमेश्वर तुला व तुझ्या

वंशजांस विलक्षण रोग लावील व दीर्घकाळ राहणाऱ्या व्याधि आणि दीर्घकाळ राहणारे विकार तुला जडवील. ६० मिसरांतील ज्या व्याधींविषयीं तुला भीति वाटत असे त्या सर्व तो तुला पुनः लावील आणि त्या तुला बिलगून राहतील. ६१ जे रोग व ज्या व्याधि या धर्मशास्त्रग्रंथांत लिहिल्या नाहींत त्याहि परमेश्वर तुला लावील व शेवटीं तुझा निःपात होईल. ६२ तूं आपला देव परमेश्वर याची वाणी ऐकली नाहीं तर आकाशांतील ताऱ्यांप्रमाणें तुम्ही अगण्य असलां तरी तुमची संख्या अल्प होईल. ६३ तुमचें बरें करावें आणि तुमची संख्या वाढवावी यांत सांप्रत जसा परमेश्वरास आनंद होत आहे तसाच आनंद तुमचा नाश व निःपात करण्यांत वाटेल; आणि ज्या भूमीचें वतन पावण्यास तुम्ही जात आहां तेथून तुमचें उच्चाटन होईल. ६४ पृथ्वीच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत, देशोदेशींच्या लोकांमध्यें परमेश्वर तुमची पांगापांग करील, आणि तेथें राहून तुला आणि तुझ्या पूर्वजांस अपरिचित अशा काष्ठपाषाणमय अन्य देवांची भक्ति तूं करिशील. ६५ त्या राष्ट्रांत तुला स्वास्थ्य प्राप्त व्हावयाचें नाहीं; तुझ्या पायांच्या तळव्यांस आधार मिळावयाचा नाहीं; तर तेथें तुझें हृदय थरथर कांपत राहील; तुझे नेत्र निस्तेज होतील व तुझा जीव झुरत राहील, असें परमेश्वर करील; ६६ तुझ्या जीविताचा तुला नेहमीं संदेह वाटेल; तूं रात्रंदिवस थरथर कांपत राहशील; तुला आपल्या जीविताची कांहीं शाश्वती वाटावयाची नाहीं; ६७ तुझ्या मनास जी धास्ती वाटेल आणि तुझ्या नेत्रांना जें दिसेल त्यामुळें तूं सकाळीं म्हणशील, संध्याकाळ होईल तर किती बरें! आणि संध्याकाळीं तूं म्हणशील, सकाळ होईल तर किती बरें! ६८ जो मार्ग पुनः तुझ्या दृष्टीस पडावयाचा नाहीं असें मी म्हणालों आहें त्याच मार्गानें परमेश्वर तुला परत नेऊन जहाजांत घालून मिसर देशांत पुनः नेईल; तेथें तुम्ही आपल्या शत्रूंचे दास व दासी होण्यासाठीं स्वतांची विक्री करूं पाहाल, पण कोणी तुम्हांस विकत घेणार नाहीं.

२९ १ होरेबांत जो करार परमेश्वरानें इस्राएल लोकांशीं केला होता त्याखेरीज मवाब देशांत त्यांच्याशीं जो करार करण्याची परमेश्वरानें मोशाला आज्ञा दिली होती त्या कराराचीं वचनें हीं:

२ मोशानें इस्राएल लोकांस बोलावून सांगितलें, परमेश्वरानें मिसर देशांत तुम्हांसमक्ष फारो व त्याचे सर्व सेवक व त्याचा अवघा देश यांत जें कांहीं केलें तें सर्व तुम्हीं पाहिलेंच आहे; ३ म्हणजे तुम्ही आपल्या डोळ्यांनीं जे मोठे मोहू लागलेले पाहिले ते चिन्हें व मोठे चमत्कार; ४ पण परमेश्वरानें तुम्हांस समजावयाला बुद्धि, पाहावयाला डोळे, ऐकावयाला कान आजपर्यंत दिले नाहींत. ५ मीं तुम्हांस चाळीस वर्षें रानांतून फिरविलें; इतक्या अवधींत तुमचीं वस्त्रें जीर्ण झालीं नाहींत किंवा तुमच्या पायांतील पायतणें झिजलीं नाहींत. ६ तुम्हांस खावयास भाकर मिळाली नाहीं, प्यावयास द्राक्षारस मिळाला नाहीं किंवा मद्य मिळालें नाहीं; असा मी परमेश्वर तुमचा देव आहें, हें तुम्हांस कळावें म्हणून हें मीं केलें. ७ तुम्ही या स्थानीं आलां तेव्हां हेशबोनचा राजा सीहोन आणि बाशानाचा राजा ओग हे आपणांबरोबर सामना करण्यास निघाले तेव्हां आपण त्यांचा मोड केला; ८ आणि त्यांचा देश घेऊन रऊबेनी, गादी आणि मनश्शाचा अर्धा वंश यांस वतन करून दिला. ९ तुम्ही कांहीं कराल त्यांत तुम्हांस यशःप्राप्तीची अपेक्षा असेल तर या कराराचीं वचनें पाळा.

१० तुम्ही सगळे आपला देव परमेश्वर याजसमोर आज उभे राहिलां आहां; तुमचे सरदार, तुमचे वंश, तुमचे वडील जन आणि तुमचे नायक असे सर्व इस्राएल लोक, ११ तुमचीं मुलेंबाळें, तुमच्या स्त्रिया, लाकूडतोड्यापासून पाणक्यापर्यंत तुमच्या छावणींतले सर्व इस्राएल लोक हे सगळे तुम्ही आज याकरितां उभे आहां कीं १२ जो करार तुझा देव परमेश्वर आज तुजशीं करीत आहे व जी आणभाक आज तुला देत आहे तींत तूं सामील व्हावें; १३ आणि त्यानें तुला दिलेलें वचन आणि तुझे पूर्वज अब्राहाम, इसहाक व

याकोब यांशीं केलेली आणभाक यांस अनुसरून तुला आज आपली प्रजा ठरवावें आणि त्यानें तुझा देव व्हावें. १४ हा करार व ही आणभाक केवळ तुम्हांशींच मी करितों असें नाहीं, १५ तर आपला देव परमेश्वर याजसमोर जे हे आज येथें उभे आहेत आणि जे आज येथें हजर नाहींत त्यांजशींहि ती मी करितों. १६ तुम्हांस ठाऊकच आहे कीं आपण मिसर देशांत राहत होतों आणि वाटेनें निरनिराळ्या राष्ट्रांतून येत होतों; १७ तेव्हां त्यांच्या काष्ठपाषाणाच्या व सोन्यारुप्याच्या मूर्ति ह्या अमंगळ वस्तु तुम्हीं पाहिल्या; १८ कोण जाणे तुमच्या लोकांत कोणी पुरुष, स्त्री, कुटुंब अथवा वंश असा असेल कीं ज्याचें हृदय आज आपला देव परमेश्वर याजपासून परावृत्त होऊन त्या राष्ट्रांच्या देवाकडे लागेल, आणि तुमच्यामध्यें असें एकादें मूळ असेल कीं ज्यास विषवल्ली अथवा कडू दवणा फुटेल; १९. असलें मूळ हीं शापवचनें ऐकून आपल्या मनाला असा धीर देईल कीं जरी मी आपल्या मनाच्या हट्टाप्रमाणें वागलों तरी माझें कुशलच होईल, पण त्याच्यामुळें सगळ्या बागायती व जिरायती जमिनीचा नाश होणार. २० परमेश्वर त्याची क्षमा करणार नाहीं; तर त्याचा कोप व त्याची ईर्ष्या असल्या मनुष्यावर धुमसेल; या ग्रंथांत लिहिलेले सर्व शाप त्याजवर येऊन पडतील; आणि परमेश्वर या भूतलावरून त्याचें नांव बुजवून टाकील. २१ धर्मशास्त्राच्या ह्या पुस्तकांत जो करार लिहिलेला आहे त्यांतील सर्व शापवचनांस अनुसरून परमेश्वर त्यास इस्राएल लोकांच्या सर्व वंशांतून वेगळें करून त्याची हानि करील. २२ पुढील पिढींतील तुमच्यानंतर होणारीं मुलें आणि दूर देशाहून आलेले परके लोक ह्या देशाची विपत्ति आणि यांत परमेश्वरानें पसरिलेले रोग पाहतील; २३ आणि हा सर्व देश गंधक व क्षार यांनीं भरून इतका जळून गेला आहे कीं, येथें कांहीं पेरणीकापणी होत नाहीं; येथें गवत उगवत नाहीं, तर परमेश्वरानें कोपायमान व क्रोधयुक्त होऊन सदोम, गमोरा, अदमा व सबोयिम यांचा विध्वंस केला तसा याचा झाला आहे, हें पाहतील; २४ तेव्हां ते, किंबहुना इतर सर्व राष्ट्रांतले लोक विचारतील, परमेश्वरानें या देशाचें असें कां केलें आहे? एवढा यावर कोप भडकविण्याचें कारण काय? २५ तेव्हां लोक उत्तर देतील कीं यांच्या पूर्वजांचा देव परमेश्वर यानें मिसर देशांतून यांस काढून आणिलें त्या समयीं यांच्याशीं जो करार केला होता तो यांनीं मोडिला; २६ व ज्याविषयीं हे अपरिचित होते व जे परमेश्वरानें यांस दिले नव्हते असल्या अन्य देवांचें यांनीं भजनपूजन केलें; २७ यास्तव परमेश्वराचा कोप या देशावर भडकून त्यानें या ग्रंथांत लिहिलेले सर्व शाप यांजवर आणिले; २८ परमेश्वरानें क्रोध, संताप व महाकोप ह्यांच्यायोगें यांचें यांच्या देशांतून उच्चाटन केलें व दुसऱ्या देशांत फेकून दिलें हें आज विदित आहे. २९. गुप्त गोष्टी आमचा देव परमेश्वर याच्या आहेत, पण प्रगट केलेल्या गोष्टी आपल्या व आपल्या वंशजांच्या निरंतरच्या आहेत; याचा हेतु हा कीं ह्या धर्मशास्त्राचीं सर्व वचनें आपण पाळावीं.

३० १ हीं आशीर्वचनें व शापवचनें तुझ्यापुढें मांडिलीं आहेत तीं तुला प्राप्त होतील, आणि ज्या ज्या राष्ट्रांत परमेश्वर तुझा देव तुला घालवून देईल तेथें तूं या गोष्टींचें स्मरण करिशील, २ आणि तूं आपल्या मुलांबाळांसह जिवेंभावें आपला देव परमेश्वर याजकडे वळशील आणि जें जें आज मी तुला सांगत आहें तदनुसार त्याची वाणी ऐकशील, ३ तेव्हां तुझा देव परमेश्वर तुझें दास्य निवारील आणि तुजवर दया करून ज्या सर्व लोकांत त्यानें तुझी पांगापांग केली असेल तेथून तुला पुनः एकवट करील. ४ तुझे परागंदा झालेले लोक दिगंतापर्यंत विखरले तरी तेथून तुझा देव परमेश्वर तुला एकवट करून परत आणील; ५ तुझे पूर्वज ज्या देशाचे वतनदार होते त्यांत तुझा देव परमेश्वर तुला आणील आणि तूं त्याचा वतनदार होशील; तो तुझें कल्याण करील आणि तुझ्या पूर्वजांपेक्षांहि तुला बहुगुणित करील. ६ तुझा देव परमेश्वर तुझ्या हृदयाची व तुझ्या वंशजांच्या

हृदयाची सुंता करील, आणि तूं आपल्या जीवनार्थ
आपला देव परमेश्वर याजवर जिवेंभावें प्रेम करिशील.
७ तुझा देव परमेश्वर हे सर्व शाप तुझ्या शत्रूंवर
व जे तुझा छळ करणारे तुझा विरोध करितील
त्यांजवर आणील. ८ तूं वळून परमेश्वराची वाणी
ऐकशील आणि ज्या आज्ञा मी आज तुला सांगत आहें
त्या सर्व पाळिशील. ९ तुझें कल्याण व्हावें म्हणून
परमेश्वर तुझा देव तुझ्या हातचें सर्व काम, तुझी
संतति, तुझ्या गुरांढोरांचे वत्स व तुझ्या भूमीचा
उपज यांसंबंधानें तुझी समृद्धि करील; परमेश्वर जसा
तुझ्या पूर्वजांवर प्रसन्न होता तसा तुझ्या कल्याणार्थ
तुजवरहि प्रसन्न होईल; १० तूं आपला देव परमेश्वर
याची वाणी ऐकून ह्या धर्मशास्त्रांत लिहिलेल्या आज्ञा
व विधि पाळिशील आणि आपला देव परमेश्वर
याजकडे जिवेंभावें वळशील तर असें होईल.

११ जें हें धर्मशास्त्र मी तुला आज देत आहें तें
तुला अगम्य नाहीं, तुजपासून दूर नाहीं. १२ तें
स्वर्गांत नाहीं कीं तूं म्हणावें आम्हीं तें पाळावें म्हणून
आमच्यासाठीं स्वर्गांत चढून जाऊन कोण तें आमच्या-
कडे आणील आणि तें आम्हांस ऐकवील? १३ तें
समुद्रापलीकडे नाहीं कीं तूं म्हणावें, आम्हीं तें ऐकून
पाळावें म्हणून आमच्यासाठीं समुद्रापलीकडे जाऊन
तें आमच्याकडे कोण आणील आणि आम्हांस तें
ऐकवील? १४ हें वचन तर तुझ्या अगदीं समीप,
तुझ्या मुखीं, तुझ्या चित्तीं आहे; म्हणून तुला
त्याप्रमाणें चालतां येईल.

१५ पाहा, जीवन व मरण, हानि व लाभ हीं आज
मीं तुजपुढें ठेविलीं आहेत; १६ मी तुला आज्ञा करीत
आहें कीं तूं आपला देव परमेश्वर याजवर प्रेम कर,
त्याच्या मार्गांनीं चाल आणि त्याच्या आज्ञा,
विधि व नियम हीं पाळ, म्हणजे तूं जिवंत राहून
बहुगुणित होशील आणि ज्या देशाचें वतन करून
घेण्यास तूं जात आहेस तेथें तुझा देव परमेश्वर तुझें
कल्याण करील; १७ पण तुझें मन फिरून तूं ऐकलें
नाहीं आणि बहकून अन्य देवांचें भजनपूजन केलें,
१८ तर मी तुला आज बजावून सांगतों कीं
तुझा खात्रीनें नाश होईल; यार्देन उतरून जो देश तूं
वतन करून घेण्यास जात आहेस तेथें तूं चिरकाळ
राहणार नाहींस, १९ आकाश आणि पृथ्वी यांस साक्षी
ठेवून आज मी तुम्हांस सांगतों कीं जीवन आणि मरण,
आशीर्वाद आणि शाप हीं तुजपुढें ठेविलीं आहेत;
तूं जीवन निवडून घे म्हणजे तूं व तुझा वंश जीवंत
राहील; २० आपला देव परमेश्वर याजवर प्रेम कर,
त्याची वाणी ऐक व त्यास धरून राहा, कारण त्यांतच
तुझें जीवन आहे, त्यांतच तुझी आयुर्वृद्धि आहे; असें
केल्यानें जो देश देण्याविषयीं परमेश्वरानें तुझे पूर्वज
अब्राहाम, इसहाक व याकोब यांशीं आणभाक केली
त्यांत तुझी वस्ती होईल.

३१ १ मोशानें जाऊन सर्व इस्राएल लोकांस हीं
वचनें सांगितलीं. २ तो त्यांस म्हणाला, मी
आज एकशेंवीस वर्षांचा झालों आहें; आतां
माझें येणेंजाणें संपलें; कारण परमेश्वरानें मला
सांगितलें आहे कीं तुला यार्देनेपलीकडे जावयाचें
नाहीं. ३ तुझा देव परमेश्वर हा तुझ्यापुढें चालून
पलीकडे जाईल; तुझ्यापुढून त्या राष्ट्रांचा निःपात
करील, आणि तूं त्यांच्या देशाचा ताबा घेशील;
आणि परमेश्वरानें पूर्वी सांगितल्याप्रमाणें यहोशवा
तुझ्यापुढें चालेल. ४ परमेश्वरानें अमोऱ्यांचे राजे
सीहोन आणि ओग यांचा व त्यांच्या देशाचा
विध्वंस केला तसाच या सर्व राष्ट्रांचाहि तो करील.
५ परमेश्वर त्यांस तुमच्या हातीं देईल तेव्हां मी
तुम्हांस दिलेल्या आज्ञांप्रमाणें त्या राष्ट्रांचें करा. ६ खंबीर
हो, हिंमत धर, त्यांस भिऊं नको, त्यांस घाबरूं
नको; कारण तुझ्याबरोबर चालणारा तुझा देव परमेश्वर
आहे; तो तुला दगा देणार नाहीं, सोडून जाणार
नाहीं. ७ मग मोशानें यहोशवास बोलावून आणून सर्व
इस्राएल लोकांदेखत सांगितलें: खंबीर हो, हिंमत
धर, कारण जो देश देण्याची आणभाक परमेश्वरानें
यांच्या पूर्वजांशीं केली होती त्यांत तूं या लोकांबरोबर
जाशील आणि तो यांस वतन करून देशील. ८ तुझ्या-

पुढें चालणारा परमेश्वर आहे, तो तुजबरोबर राहील,
तो तुला दगा देणार नाहीं, सोडून जाणार नाहीं; भिऊं
नको, धीर सोडूं नको.

९ मग मोशानें हें धर्मशास्त्र लिहून परमेश्वराच्या
कराराचा कोश वाहणारे लेवीय याजक आणि इस्राएल
लोकांचे सगळे वडील जन यांच्या स्वाधीन केलें.
१० तेव्हां मोशानें त्यांस आज्ञा केली कीं दर सात
वर्षांच्या अखेरीस म्हणजे मुक्ततेच्या वर्षी, मंडपांच्या
सणाच्या वेळीं, ११ जें स्थळ तुझा देव परमेश्वर
निवडून घेईल तेथें सर्व इस्राएल लोक हजर होतील
तेव्हां हें धर्मशास्त्र वाचून दाखीव. १२ त्यांचे पुरुष,
स्त्रिया, बालकें अथवा तुझ्या वेशींच्या आंत राहणारे
परदेशीय या सर्व लोकांस जमवावें म्हणजे ते तें श्रवण
करून शिकतील आणि तुमचा देव परमेश्वर याचें ते
भय धरितील आणि या धर्मशास्त्रांतील सर्व वचनें मान्य
करून पाळितील; १३ त्यांच्या मुलांबाळांना हीं वचनें
ठाऊक नाहींत, तीं हीं ऐकतील; आणि यार्देन उतरून
जो देश तुम्ही वतन करून घेणार आहां त्यांत जोंवर
तुमचें जीवन असेल तोंवर तुमचा देव परमेश्वर याचें
भय धरण्यास तीं शिकतील.

१४ मग परमेश्वरानें मोशाला सांगितलें कीं तुझा
अंतकाळ समीप आला आहे तर यहोशवास बोलाव;
आणि तुम्ही दोघे दर्शनमंडपांत हजर व्हा म्हणजे मी
त्यास ताकीद देईन. मग मोशे व यहोशवा दर्शन-
मंडपांत हजर झाले. १५ तेव्हां परमेश्वर त्या तंबूंत
मेघस्तंभाच्या ठायीं प्रगट झाला; हा मेघस्तंभ तंबूच्या
दारीं उभा राहिला. १६ तेव्हां परमेश्वर मोशाला
म्हणाला, पाहा, तूं जाऊन स्वपितरांबरोबर निजशील;
हे लोक फितूर होतील, आणि ज्या लोकांमध्यें
हे जाऊन राहणार आहेत त्यांच्या देशांतील अन्य
देवांच्या मागें हे व्यभिचारी बुद्धीनें लागतील व माझा
त्याग करून मी त्यांजशीं केलेला करार मोडितील.
१७ त्या समयीं त्यांजवर माझा कोप भडकेल, मी
त्यांचा त्याग करून त्यांपासून आपलें मुख लपवीन;
त्यांचा फडशा उडेल व त्यांजवर बहुत विपत्ति व क्लेश
ओढवतील तेव्हां ते म्हणतील आमचा देव आमच्या-
मध्यें नाहीं म्हणूनच या सर्व विपत्ति आम्हांवर येऊन
पडल्या आहेत ना? १८ ते अन्य देवांकडे वळल्यानें
त्यांच्या हातून पातक होईल त्या समयीं मी
आपलें मुख त्यांपासून लपवीन. १९ याकरितां तुम्ही हें
गीत आतां लिहून घ्या, हें इस्राएल लोकांस शिकवा,
त्यांच्या मुखीं हें घाला, म्हणजे हें त्यांच्याविरुद्ध माझ्या-
साठीं साक्ष देईल. २० ज्यांत दुधामधाचे प्रवाह वाहत
आहेत असा देश देण्याची आणभाक मीं त्यांच्या
पूर्वजांशीं केली होती त्यांत मीं त्यांस नेऊन पोहंचविल्या-
वर ते पोटभर खाऊन माजतील, आणि मग ते अन्य
देवांकडे वळून त्यांची उपासना करूं लागतील आणि
मला तुच्छ मानून माझा करार मोडितील. २१ त्यांच्या-
वर पुष्कळ संकटें व अरिष्टें आलीं म्हणजे हें गीत
त्यांना साक्षीदाखल होईल; कारण तें त्यांच्या
वंशजांच्या मुखीं सदोदित राहील; ज्या देशांत त्यांस
घेऊन जाण्याची मीं आणभाक केली त्यांत त्यांस
अजून नेऊन पोहंचविलें नाहीं तोंच त्यांच्या काय
काय कल्पना चालल्या आहेत हें मी जाणून आहें.
२२ मोशानें त्याच दिवशीं हें गीत लिहून काढिलें व
इस्राएल लोकांस शिकविलें. २३ मग त्यानें नूनाचा पुत्र
यहोशवा यास आज्ञा केली कीं खंबीर हो, हिंमत
धर, कारण जो देश मीं इस्राएल लोकांस शपथपूर्वक
देऊं केला आहे त्यांत तुला त्यांस घेऊन जावयाचें
आहे; मी तुझ्याबरोबर असेन.

२४ मोशानें या नियमशास्त्राचीं वचनें पुस्तकांत
साद्यंत लिहून संपविलीं २५ तेव्हां त्यानें परमेश्वराच्या
कराराचा कोश वाहणारे लेवी यांस आज्ञा केली कीं
२६ नियमशास्त्राचा हा ग्रंथ तुमचा देव परमेश्वर
याच्या कराराच्या कोशाजवळ नेऊन ठेवा म्हणजे तो
तेथें तुजविरुद्ध साक्षीदार होऊन राहील. २७ तुझा
बंडखोरपणा आणि तुझ्या मानेचा ताठा मी जाणून
आहें; पाहा, मी आजपर्यंत तुमच्याबरोबर जीवंत
असतां तुम्ही परमेश्वराविरुद्ध बंड करावयास चुकलां
नाहीं, तर मी मेल्यावर किती तरी कराल! २८ तर

आतां आपल्या वंशांचे सर्व वडील जन आणि आपले
सरदार यांस माझ्याजवळ जमवा म्हणजे मी आकाश
व पृथ्वी यांस साक्षी ठेवून त्यांच्या कानांवर हीं वचनें
घालीन. २९ कारण मला ठाऊक आहे कीं मी मेल्यावर
तुम्ही अगदीं बिघडून जाल; ज्या मार्गानें तुम्हांस
चालण्याविषयीं मीं आज्ञा केली आहे तो तुम्ही सोडून
द्याल व पुढील काळीं परमेश्वराच्या दृष्टीनें वाईट अशीं
कर्में कराल आणि आपल्या हातांनीं केलेल्या वस्तूंची
पूजा करून त्याचा राग चेतवाल तेव्हां तुम्हांवर अरिष्ट
येऊन पडेल.

३० मग मोशानें इस्राएल लोकांच्या सर्व मंडळीस
या गीताचे सर्व शब्द अथपासून इतिपर्यंत ऐकविले :

**३२**

१ हे आकाशा, कान दे, मी बोलत आहें;
पृथ्वी माझ्या तोंडचे शब्द ऐको;
२ पर्जन्याप्रमाणें माझ्या बोधाची वृष्टि होवो,
माझें भाषण दहिंवराप्रमाणें ठिबको;
हिरव्यागार गवतावर जशा पावसाच्या सरी,
हिरवळीवर जशी वृष्टि तसें हें वर्षो;
३ मी परमेश्वराच्या नामाची घोषणा करीन;
आमच्या देवाचा महिमा वर्णा.
४ तो दुर्ग आहे; त्याची कृति अव्यंग आहे;
त्याचे सर्व मार्ग न्यायाचे आहेत;
तो सत्य देव आहे, त्याच्या ठायीं अधर्म नाहीं,
तो न्यायी व सरळ आहे.
५ हे बिघडले आहेत, हे त्याचे पुत्र नव्हत;
हा असा त्यांचा दोष आहे;
ही प्रजा हेकट व कुटिल आहे.
६ अहो मूढ व निर्बुद्धि लोकहो,
तुम्ही परमेश्वराचे उपकार असे फेडतां काय ?
ज्यानें तुला केलें तोच तुझा पिता ना ?
त्यानेंच तुला निर्माण केलें व स्थापिलें.
७ पुरातन काळच्या दिवसांचें स्मरण कर,
कैक पिढ्यांचीं वर्षें ध्यानांत आण;
आपल्या बापाला विचार, तो तुला निवेदन करील;
आपल्या वडील जनांस विचार; ते तुला सांगतील.
८ जेव्हां परात्परानें एकेका राष्ट्रास त्याचें त्याचें वतन
वांटून दिलें,
जेव्हां त्यानें मानवांस निरनिराळें वसविलें,
तेव्हां त्यानें इस्राएल लोकांच्या संख्येप्रमाणें
राष्ट्रांच्या सीमा आंखून दिल्या.
९ कारण परमेश्वराचे लोक हाच त्यांचा वांटा,
याकोब हा त्याचा नेमिलेला वतनभाग.
१० तो त्यांस अरण्यांत,
शून्य व घोर अशा मरुभूमींत आढळला;
त्यानें त्याच्या आसपास राहून त्याची निगा केली,
डोळ्याच्या बाहुलीप्रमाणें त्याचें रक्षण केलें;
११ गरुड-पक्षीण आपलें कोटें हालविते,
आपल्या पिलांच्यावर तळपत असते,
त्याप्रमाणें त्यानें आपले पंख पसरून
त्यांस घेतलें, आपल्या परांवर वाहिलें;
१२ परमेश्वरच त्याचा अनन्य नेता झाला,
त्याजबरोबर कोणी अन्य दैवत नव्हतें.
१३ त्यानें त्यास पृथ्वीवरील उंच उंच स्थानांवरून
मिरवीत नेलें,
त्यानें शेताचा उपज खाल्ला;
त्यानें त्यास खडकांतील मध
आणि गारगोटीच्या खडकांतील तेल चाटविलें;
१४ गाईचें लोणी, मेंढ्यांचें दूध,
कोकरांची चरबी,
बाशानचे एडके व बकरे,
उत्तम गव्हांचें सत्त्व,
हीं त्यास दिलीं;
द्राक्षारसाची मदिरा तूं प्यालास;
१५ पण यशुरून पुष्ट होऊन लाता झाडूं लागला;
तूं धष्टपुष्ट झालास, तूं माजलास, तुला माज चढला;
तेव्हां त्यानें आपल्या निर्माणकर्त्या देवाचा त्याग
केला,
आपल्या तारकदुर्गास त्यानें तुच्छ मानिलें.
१६ त्यांनीं अन्य देवांच्या मागें लागून त्यास ईर्ष्येस
पेटविलें.

अमंगळ कृत्यें करून त्याचा राग चेतविला.
१७ ज्यांच्या ठायीं देवपण नाहीं अशा भूतांस त्यांनीं बलि अर्पिले,
जे अलीकडेच नवीन निघाले आहेत,
व ज्यांचें भय तुमचे पूर्वज धरीत नव्हते,
अशा अपरिचित देवांस त्यांनीं बलि अर्पिले.
१८ ज्या खडकानें तुला जन्म दिला त्याजकडे तूं दुर्लक्ष केलें आहे,
तुझ्यासाठीं प्रसवकष्ट सोसणाऱ्या देवास तूं विसरला आहेस,
१९ हें पाहून परमेश्वराला त्यांचा वीट आला,
कारण त्यांचे पुत्र व कन्या यांनीं त्याचा राग चेतविला.
२० तो म्हणाला, मी त्यांजपासून आपलें मुख लपवीन,
त्यांचा अंत कसा काय होतो तें मी पाहीन;
कारण ही कुटिल प्रजा आहे.
जिचा भरंवसा नाहीं अशी ही मंडळी आहे.
२१ ज्याच्यांत देवपण नाहीं त्याच्यामागें लागून त्यांनीं मला ईर्ष्येस पेटविलें,
खोट्यानाट्या वस्तूंच्या नादीं लागून त्यांनीं मला चिडविलें; म्हणून ज्यांचें राष्ट्र नव्हे,
अशांच्या योगें मी त्यांस ईर्ष्येस पेटवीन,
एका मूढ राष्ट्राच्या योगें त्यांस चिडवीन.
२२ कारण माझा क्रोधाग्नि प्रदीप्त झाला आहे,
अधोलोकाच्या तळापर्यंत त्यानें पेट घेतला आहे;
त्यानें पृथ्वी व तिजवरला उपज भस्म करून टाकिला आहे,
डोंगराचे पायथे देखील तो जाळून टाकीत आहे.
२३ मी त्यांजवर अरिष्टांचे डोंगर कोसळवीन;
मी त्यांजवर आपले सर्व बाण सोडीन;
२४ ते क्षुधेनें क्षीण होतील,
प्रखर तापानें व दुर्धर प्रलयानें ते ग्रस्त होतील;
श्वापदांचे दांत आणि जमिनीवर सरपटणाऱ्या सर्पांचें विष त्यांजवर पाठवीन.
२५ बाहेर तरवार व घरांत दहशत
ह्या त्यांचे प्राण हरण करितील;
मग तो कुमार असो कीं कुमारी असो,
तान्हें बालक असो कीं पिकल्या केसांचा म्हातारा असो.
२६ मी मनांत म्हणालों कीं त्यांची दूरवर पांगापांग करावी,
मानवांतून त्यांची आठवणच बुजवावी;
२७ पण शत्रूच्या खिजवण्यास मी भ्यालों,
त्यांच्या विरोध्यांनीं याचा भलताच अर्थ केला असता,
ते म्हणाले असते कीं आमच्याच हाताचें वर्चस्व झालें आहे,
आणि हें सगळें परमेश्वरानें केलें नव्हे.
२८ हे लोक बेअकल आहेत,
यांच्यांत समज मुळींच नाहीं.
२९ हे शहाणे असते तर यांना हें समजतें,
आपला अखेर परिणाम यांस कळता.
३० यांच्या दुर्गानें यांचा विक्रय केला नसता,
परमेश्वरानें यांस परकीयांच्या हातीं दिलें नसतें,
तर एकानें सहस्रांची पाठ पुरवावी,
दोघांनीं दशसहस्रांस पळवावें,
हें कसें घडून आलें असतें?
३१ त्यांचा दुर्ग आमच्या दुर्गासारखा नाहीं,
हें आमचे शत्रुहि जाणून आहेत.
३२ त्यांची द्राक्षलता सदोमाच्या द्राक्षलतेपासून निघाली आहे,
ती गमोरेच्या मळ्यांतली आहे;
त्यांचीं द्राक्षें विषमय आहेत,
त्यांचे घोस कडू आहेत.
३३ त्यांचा द्राक्षारस सर्पांचें विष,
भुजंगाचें जालीम गरळ आहे.
३४ ही गोष्ट माझ्या मनांत सांठवलेली नाहीं काय?
माझ्या भांडारांत ती मोहरबंद केलेली नाहीं काय?
३५ सूड घेणें व उसनें फेडणें हें मजकडे आहे,
त्यांचे पाय घसरतील तेव्हां हें घडेल;

कारण त्यांच्या विपत्तीचा दिवस जवळ आला आहे,
त्यांजवर ओढवणारे प्रसंग शीघ्र येत आहेत.
३६ कारण त्यांचा आश्रय तुटला आहे,
बद्ध किंवा मुक्त असा कोणी उरला नाहीं,
असें परमेश्वर पाहील तेव्हां तो आपल्या लोकांचा न्याय करील,
त्याला आपल्या सेवकांचा कळवळा येईल.
३७ मग तो म्हणेल, त्यांचे देव कोठें आहेत ?
ज्यावर त्यांनीं भिस्त ठेविली तो त्यांचा दुर्ग कोठें आहे ?
३८ त्यांच्या यज्ञांतली वपा खाणारे
त्यांच्या पेयार्पणांतला द्राक्षारस पिणारे देव कोठें आहेत ?
आतां त्यांनीं उठून तुमचें साहाय्य करावें,
तुम्हांस आपल्या छायेस घ्यावें.
३९ तर पाहा, मी, मीच तो आहें,
मजपरता दुसरा कोणी देव नाहीं;
प्राणहरण व प्राणदान करणारा,
घाय करणारा व घाय बरा करणारा मीच आहें;
माझ्या हातून सोडविणारा कोणी नाहीं.
४० मी आपला बाहु आकाशाकडे उभारून म्हणतों,
माझ्या सनातन जीविताची शपथ,
४१ मीं आपली चमकणारी तरवार पाजविली,
आपला हात न्यायाला घातला;
तर मी आपल्या विरोध्यांचा सूड घेईन,
माझ्या वैऱ्यांचें उसनें फेडीन.
४२ मी आपले बाण रक्त पाजून तर्र करीन,
माझी तरवार मांस भक्षील;
वधलेल्यांचें व पाडाव केलेल्यांचें,
शत्रूंच्या केसाळ मस्तकांचें हें रक्त.
४३ राष्ट्रांनो, त्याच्या प्रजेचा जयजयकार करा;
कारण तो आपल्या सेवकांच्या रक्तपाताचा बदला घेईल,
तो आपल्या वैऱ्यांचा सूड घेईल,
तो आपला देश व आपली प्रजा यांच्या पातकांचें क्षालन करील.

४४ या स्तोत्राचे सर्व शब्द मोशानें नूनाचा पुत्र
यहोशवा यास बरोबर घेऊन लोकांस ऐकविले.
४५ याप्रमाणें मोशानें हीं सर्व वचनें इस्राएल लोकांस
सांगण्याचें संपविलें; ४६ मग तो त्यांस म्हणाला, ज्या
गोष्टी आज मी तुम्हांस बजावून सांगत आहें त्यांकडे
लक्ष द्या; या नियमशास्त्रांतील सर्व गोष्टी मान्य करून
पाळाव्या अशी आज्ञा तुम्ही आपल्या मुलांस करा.
४७ हें कांहीं तुम्हांला निरर्थक नाहीं; हें केवळ तुमचें
जीवन होय, याच्याच योगें तुम्ही यार्देन उतरून
ज्या देशाचा ताबा घेणार आहां तेथें चिरकाळ राहाल.

४८ मग त्याच दिवशीं परमेश्वरानें मोशाला सांगितलें,
४९ मवाब देशांत यरीहोसमोर अबारीम पर्वतांत
नबो म्हणून शिखर आहे त्यावर चढ, आणि जो कनान
देश मी इस्राएल लोकांस वतन करून देत आहें त्याचें
तेथून अवलोकन कर; ५० तुझा भाऊ अहरोन हा
होर डोंगरावर मरून स्वजनांस जाऊन मिळाला, तसाच
तूंहि या डोंगरावर चढून जाऊन तेथें मरशील आणि
स्वजनांस जाऊन मिळशील; ५१ याचें कारण हेंच
कीं सीन रानांत कादेशच्या मरीबा नामक झऱ्याजवळ
तुम्हीं दोघांनीं इस्राएल लोकांदेखत माझा अपराध
केला व त्यांच्यासमोर मला पवित्र मानिलें नाहीं.
५२ ह्यामुळें जो देश मी इस्राएल लोकांस देत
आहें तो तूं डोळ्यांनीं पाहशील, पण तुझें तेथें
जाणें होणार नाहीं.

## ३३

१ देवभक्त मोशे यानें आपल्या मरणा-
पूर्वी इस्राएल लोकांस आशीर्वाद दिला तो हा:
२ तो म्हणाला,
परमेश्वर सीनायहून आला,
सेईरावरून त्यांजवर उदय पावला;
पारान पर्वतावरून तो प्रकाशला,
लक्षावधि पवित्र गणांमधून तो आला;
त्याच्या उजव्या हाताकडून अग्निज्वाला निघाली.
३ तो सर्व लोकांवर प्रेम करितो;
त्याचे सर्व पवित्र जन तुझ्या हातीं आहेत;
ते तुझ्या पायांशीं बसले आहेत;

ते तुझीं वचनें ग्रहण करितात.
४ मोशानें आम्हांस नियमशास्त्र लिहून दिलें,
तें याकोबाच्या मंडळीचें वतन होय.
५ लोकनायक जमा झाले,
इस्राएलाचे वंशज एकवटले,
तेव्हांपासून तो यशुरूनाच्या राजासनावर आरूढ झाला.
६ रऊबेन जीवंत राहो, तो मृत्यु न पावो;
पण त्याचे लोक मोजके असोत.
७ यहूदास आशीर्वाद दिला तो हा:
हे परमेश्वरा, यहूदाचें म्हणणें ऐक,
त्यास त्याच्या लोकांमध्यें परत आण;
यासाठीं तो आपल्या हातांनीं झगडला;
त्याच्या शत्रूंविरुद्ध त्याला साहाय्य हो.
८ मग लेव्याविषयीं तो म्हणाला,
तुझे उरीम व थुम्मीम तुझ्या भक्तापाशीं राहोत,
त्यास तूं मस्सा एथें पारखिलें,
मरीबाच्या झऱ्याजवळ तूं त्याशीं झुंजलास;
९ तो आपल्या मातापितरांविषयीं म्हणाला,
मी त्यांस जाणत नाहीं;
त्यानें आपले भाऊबंद ओळखिले नाहींत,
त्यानें प्रत्यक्ष आपल्या पुत्रांची ओळख ठेविली नाहीं;
पण त्यानें तुझा शब्द मानिला आणि तुझा करार पाळिला.
१० ते याकोबास तुझ्या अनुज्ञा,
इस्राएलास तुझें नियमशास्त्र शिकवितील;
ते तुला धुपाचा सुवास अर्पितील,
तुझ्या वेदीवर निःशेष होमबलि अर्पितील.
११ हे परमेश्वरा, त्याच्या मालमत्तेस बरकत दे,
त्याच्या हातचें काम मान्य करून घे;
त्याचे विरोधी आणि त्याचे शत्रु यांची कमर अशी मोड कीं
ते पुनः उठावयाचे नाहींत.
१२ मग तो बन्यामिनाविषयीं म्हणाला,
परमेश्वराचा तो प्रियजन आहे,
त्याच्यापाशीं तो निर्भय वास करील;
परमेश्वर दिवसभर त्याजवर छाया करील,
तो त्याच्या स्कंधप्रदेशीं राहील.
१३ मग योसेफाविषयीं तो म्हणाला,
परमेश्वर त्याच्या देशास पुढील बाबतींत बरकत देवो;
आकाशाचे अमूल्य पदार्थ व दहिंवर,
खालीं पसरलेला महासागर,
१४ सूर्यापासून उद्भवणारे अमूल्य पदार्थ,
चंद्रापासून उपजणारे बहुमोल पदार्थ,
१५ प्राचीन गिरींवरील उत्तम वस्तु,
सनातन डोंगरांवरील अमूल्य पदार्थ,
१६ पृथ्वीवरील व तिच्या महामूर उत्पन्नांतील बहुमोल पदार्थ,
जो झुडपांत प्रगट झाला होता त्याची प्रसन्नता;
यांचा आशीर्वाद योसेफाच्या माथ्यावर येवो,
जो आपल्या बंधूंमध्यें श्रेष्ठत्व पावला होता
त्याच्या माथ्यावर तो येवो.
१७ त्याचा प्रथम वत्स प्रतापी आहे;
त्याचीं शृंगें गव्याचींच शृंगें होत;
त्यांनीं तो देशोदेशींच्या लोकांस,
पृथ्वीच्या दिगंतांस हुंदडील;
एफ्राइमाचे ते लाखों, मनश्शाचे ते हजारों आहेत.
१८ जबुलूनाविषयीं तो म्हणाला,
हे जबुलूना, तूं बाहेर जाशील तेथें आनंद कर;
हे इस्साखारा, तूं आपल्या डेऱ्यांत आनंद कर.
१९ ते देशोदेशींच्या लोकांस डोंगरावर बोलावितील;
ते तेथें धर्मशीलतेनें यज्ञ करितील.
कारण ते समुद्रांतलें धन आणि वाळूंतले गुप्तनिधि काढून घेतील.
२० मग गादाविषयीं तो म्हणाला,
गादाचा विस्तार करणारा तो धन्य;
तो सिंहिणीसारखा बसतो,
तो बाहु व माथा विदारितो.
२१ त्यानें वतनाचा पहिला हिस्सा पाहून घेतला,

सरदारांस योग्य असा वांटा तेथें राखून ठेविला
होता;
त्यानें लोकनायकांबरोबर येऊन,
इस्राएल लोकांसह परमेश्वराचा न्याय व त्याच्या
अनुज्ञा बजाविल्या.
२२ मग दानाविषयीं तो म्हणाला,
दान हा सिंहाचा पेटा आहे,
त्यानें बाशानांतून उडी मारिली आहे.
२३ आणि नफतालीविषयीं तो म्हणाला,
हे नफताली, जो तूं परमेश्वराच्या प्रसादानें तृप्त,
व त्याच्या वरदानानें पूर्ण;
तो तूं समुद्र व दक्षिण देश यांचें वतन पाव.
२४ मग आशेराविषयीं तो म्हणाला,
इतर पुत्रांहून आशेर धन्य असो,
तो आपल्या बांधवांस प्रिय होवो,
त्याचें पाऊल तेलांत बुडो.
२५ तुझे अडसर लोखंडाचे व पितळेचे असोत;
तुझें वय वाढत असतां तुझें सामर्थ्य कायम राहो.
२६ हे यशुरूना, देवासमान कोणी नाहीं,
तो तुझ्या साहाय्यार्थ मेघमंडळावर आरूढ होऊन
आपल्या प्रतापानें आकाशपंथानें धाव घेतो.
२७ अनादि देव तुझें निजधाम आहे,
सनातन बाहूंचा तुला आधार आहे;
त्यानें शत्रूस तुझ्यापुढून हाकून दिलें
व म्हटलें, त्याचा विध्वंस कर.
२८ याकरितां इस्राएल निर्भय वसत आहे,
अन्न व द्राक्षारस यांनीं समृद्ध अशा प्रदेशीं केवळ
याकोबाचा निर्झर उफळतो;
आणि त्याजवरल्या आकाशांतील दहिंवराचा
त्याजवर वर्षाव होतो.
२९ हे इस्राएला, तूं धन्य आहेस;
परमेश्वरानें उद्धरिलेल्या प्रजे, तुजसमान कोण आहे ?
तो तुझ्या साहाय्याची ढाल आहे,
तुझ्या प्रतापाची तरवार आहे.
त्यामुळें तुझे शत्रु तुला शरण येतील;
तूं त्यांचीं उच्चस्थानें पादाक्रांत करिशील.

३४ १ मग मोशे मवाबाच्या सपाटीवरून यरीहो-
समोरल्या पिसगा पर्वताच्या नबो नामक
शिखरावर चढला, तेव्हां दानापर्यंतचा सर्व
गिलाद प्रदेश, २ नफतालीचा सर्व प्रदेश, एफ्राइमाचा
व मनश्शाचा सर्व प्रदेश आणि पश्चिम समुद्रापर्यंतचा
यहूद्याचा सर्व प्रदेश, ३ आणि दक्षिण प्रदेश आणि
सोअरापर्यंतची तळवट म्हणजे खजूरीचें नगर, यरीहोचें
मैदान हीं सर्व परमेश्वरानें त्यास दाखविलीं. ४ मग
परमेश्वर त्यास म्हणाला, ज्या देशाविषयीं मीं अब्राहाम,
इसहाक व याकोब यांच्याशीं आणभाक केली होती कीं
तो मी तुझ्या वंशजांस देईन, तो प्रदेश हाच; मीं तो
तुला प्रत्यक्ष दाखविला आहे, पण नदी उतरून तुला
तेथें जावयाचें नाहीं. ५ परमेश्वरानें सांगितल्याप्रमाणें
त्याचा सेवक मोशे तेथें मवाब देशीं मरण पावला;
६ आणि त्यानें त्यास मवाब देशांतील बेथ-पौरासमोर
एका खोऱ्यांत मूठमाती दिली; परंतु त्याच्या कबरेविषयीं
आजवर कोणासहि माहिती नाहीं. ७ मोशे मृत्युसमयीं
एकशेंवीस वर्षांचा होता; तरी त्याची दृष्टि मंद झाली
नव्हती व त्याची प्रकृति क्षीण झाली नव्हती. ८ इस्राएल
लोकांनीं मवाबाच्या मैदानांत मोशासाठीं तीस दिवस
शोक केला; येणेंप्रमाणें मोशाबद्दल सुतक धरून विलाप
करण्याचे दिवस संपले. ९ नूनाचा पुत्र यहोशवा याच्या
ठायीं बुद्धीची पूर्ण प्रेरणा झाली होती; कारण मोशानें
त्याजवर आपले हात ठेविले होते; परमेश्वरानें मोशाला
सांगितल्याप्रमाणें इस्राएल लोक त्याच्या आज्ञेंत राहून
वर्तू लागले. १० परमेश्वरापाशीं समोरासमोर भाषण
करणारा मोशासमान दुसरा कोणी संदेष्टा इस्राएलांत
झाला नाहीं; ११ परमेश्वरानें त्यास फारो व त्याचे सर्व
सेवक यांजपुढें आणि सर्व मिसर देशांत जीं चिन्हें व
चमत्कार करण्यास पाठविलें त्यांत, १२ आणि त्यानें सर्व
इस्राएल लोकांदेखत जो हस्तप्रताप व जो दरारा प्रगट
केला त्यांत त्याजसमान कोणी झाला नाहीं.

# यहोशवा



१ परमेश्वराचा सेवक मोशे याच्या मृत्यूनंतर
१ परमेश्वरानें मोशाचा मदतनीस नूनाचा पुत्र
यहोशवा यास सांगितलें कीं २ माझा सेवक मोशे
मृत्यु पावला आहे; तर ऊठ, इस्राएल लोकांस जो देश
मी देत आहें त्यांत या सर्व लोकांसह यार्देन उतरून
जा. ३ मीं मोशाला सांगितलें होतें त्याप्रमाणें ज्या
ज्या ठिकाणीं तुमचें पाऊल पडेल तें तें ठिकाण मीं
तुम्हांस दिलें आहे. ४ रान व हा लबानोन पर्वत,
महानद फरात येथपर्यंत हित्ती यांचा सर्व देश व
मावळतीकडे महासमुद्रापर्यंतचा मुलूख तुमचा होईल.
५ तुझ्या हयातींत तुझ्यापुढें कोणाचाहि टिकाव
लागणार नाहीं; जसा मोशाच्याबरोबर मी राहिलों
तसाच तुझ्याबरोबर मी राहीन; मी तुला अंतर देणार
नाहीं, तुला टाकणार नाहीं. ६ खंबीर हो, हिंमत धर;
कारण जो देश देण्याविषयीं या लोकांच्या वाडवडिलांस
मीं आणभाक केली आहे तो तूं यांस वतन करून
देशील. ७ मात्र तूं खंबीर हो व हिंमत धर आणि
माझा सेवक मोशे यानें तुला दिलेलें नियमशास्त्र सगळें
मान्य करून पाळ; तें सोडून उजवीडावीकडे जाऊं
नको, म्हणजे तूं जाशील तिकडे तुला यशःप्राप्ति घडेल.
८ नियमशास्त्राचा हा ग्रंथ तुझ्या मुखांतून कदापि ढळूं
नये; त्यांत जें कांहीं लिहिलें आहे तें तूं मान्य करून
पाळावें, म्हणून रात्रंदिवस तूं त्याचें मनन करावें;
म्हणजे तुझा मार्ग सुखाचा होऊन तुला यशःप्राप्ति
घडेल. ९ मीं तुला आज्ञा केली आहे ना? खंबीर हो,
हिंमत धर, भिऊं नको, घाबरूं नको; तूं जाशील
तिकडे तुझा देव परमेश्वर तुजबरोबर असणार.

१० मग यहोशवानें लोकांच्या अमलदारांस अशी
आज्ञा केली कीं ११ छावणींत चोहोंकडे फिरून लोकांस
असा हुकूम करा कीं, आपली भोजनसामग्री तयार
करा; कारण तुमचा देव परमेश्वर जो देश तुम्हांस वतन
करून देत आहे त्याचा ताबा घेण्यासाठीं तीन दिवसांच्या
आंत ही यार्देन उतरून तुम्हांस जावयाचें आहे.

१२ मग यहोशवानें रऊबेनी, गादी व मनश्शाचा
अर्धा वंश यांस म्हटलें, १३ परमेश्वराचा सेवक मोशे
यानें तुम्हांस आज्ञा दिली होती तिचें स्मरण करा; त्यानें
तुम्हांस सांगितलें होतें कीं तुमचा देव परमेश्वर तुम्हांस
आराम देत आहे व हा देश तुम्हांस देणार आहे.
१४ तुमच्या स्त्रिया, मुलेंबाळें आणि जनावरें यांनीं या
यार्देनेच्या पूर्वेकडील जो देश मोशानें तुम्हांस दिला आहे
त्या देशांतच राहावें; पण तुम्हीं सर्व योद्ध्यांनीं सशस्त्र
होऊन आपल्या बांधवांच्या पुढें कूच करून नदी-
पलीकडे जावें आणि त्यांस कुमक करावी. १५ तुम्हांस
आराम दिला आहे तसा आराम परमेश्वर तुमच्या
बांधवांस देईल आणि तुमचा देव परमेश्वर यानें त्यांस
दिलेल्या देशाचा ते ताबा घेतील तेव्हां परमेश्वराचा
सेवक मोशे यानें यार्देनेच्या अलीकडे, उगवतीकडे
जो देश तुम्हांस दिला आहे त्या तुमच्या वतनाच्या
देशीं परत येऊन त्याचा ताबा तुम्हीं घ्यावा. १६ तेव्हां
ते सर्व यहोशवास म्हणाले, जें कांहीं करण्याची तूं
आम्हांस आज्ञा देत आहेस तें आम्ही करूं आणि तूं
आम्हांस पाठविशील तिकडे आम्ही जाऊं. १७ जसें
आम्ही सर्व बाबतींत मोशाचें ऐकत होतों तसेंच आम्ही
तुझेंहि ऐकूं; मात्र तुझा देव परमेश्वर मोशाच्याबरोबर
होता तसाच तुझ्याबरोबर असो. १८ तुझ्या आज्ञेच्या
विरुद्ध जो कोणी वर्तेल व तुझ्या सर्व आज्ञावचनांचा
अवमान करील, त्याला मरणदंड करण्यांत यावा; तूं मात्र
खंबीर हो, हिंमत धर.

१ नूनाचा पुत्र यहोशवा यानें गुप्तपणें दोन हेर
२ शिट्टीम येथून पाठविले; त्यानें त्यांस सांगितलें कीं
जा आणि तो देश व यरीहो हीं हेरून या. ते गेले
आणि रहाब नामक वेश्येच्या घरीं उतरले. २ मग कोणी

यरीहोच्या राजास सांगितलें कीं आज रात्रीं कांहीं
इस्राएल लोक आमच्या देशाचा भेद काढण्यास येथें
आले आहेत. ३ तेव्हां यरीहोच्या राजानें रहाबेस
सांगून पाठविलें कीं जे पुरुष तुजकडे येऊन तुझ्या
घरीं उतरले आहेत त्यांस बाहेर काढ; कारण साऱ्या
देशाचा भेद काढण्यास ते आले आहेत. ४ त्या दोन्ही
पुरुषांस लपवून ती स्त्री म्हणाली, मजकडे कोणी
पुरुष आले होते खरे, पण ते कोठले हें मला ठाऊक
नाहीं; ५ अंधार पडल्यावर वेस लावून घेण्याच्या वेळीं
ते निघून गेले; ते कोठें गेले तें मला ठाऊक नाहीं;
तुम्ही त्वरेनें त्यांचा पाठलाग करा म्हणजे त्यांस
गांठाल. ६ तिनें त्या माणसांस धाब्यावर नेऊन
तेथें जवसाचीं ताटें पसरलीं होतीं त्यांत लपवून
ठेवलें होतें. ७ ते पुरुष त्यांचा शोध करीत
यार्देनेच्या वाटेनें उतारापर्यंत गेले; त्यांचा पाठलाग
करणारे गांवाबाहेर पडतांच वेस लावून घेण्यांत आली.
८ इकडे ते हेर झोपीं जाण्यापूर्वी ती स्त्री त्यांजकडे
धाब्यावर गेली, ९ आणि त्यांस म्हणाली, परमेश्वरानें
हा देश तुम्हांस दिला आहे, आमच्या लोकांस तुमच्या-
मुळें दहशत पडली आहे, आणि देशांतील सर्व
रहिवाश्यांची तुमच्यामुळें गाळण उडाली आहे हें मला
ठाऊक आहे. १० कारण तुम्ही मिसर देशांतून निघालां
तेव्हां तुम्हांपुढें परमेश्वरानें तांबड्या समुद्राचें पाणी
आटविलें; आणि यार्देनेपलीकडे राहणारे अमोऱ्यांचे
दोन राजे सीहोन व ओग यांचा तुम्हीं संहार केला हें
आमच्या कानीं आलें आहे. ११ हें ऐकतांच आमच्या
काळजाचें पाणीपाणी झालें, तुमच्यामुळें कोणाच्या
जिवांत जीव राहिला नाहीं; कारण तुमचा देव परमेश्वर
हा वर आकाशांत व खालीं पृथ्वीवर देव आहे. १२ मीं
तुमच्यावर दया केली आहे, यास्तव आतां मजशीं
परमेश्वराच्या नामानें आणभाक करा कीं आम्हीहि तुझ्या
बापाच्या घराण्यावर दया करूं; आणि याबद्दल मला
खात्रीलायक खूण द्या; १३ आणि आम्ही तुझीं मातापितरें,
बंधुभगिनी आणि तुम्हां सर्वांचे यांचा बचाव करूं आणि
तुम्हां सर्वांचे प्राण मृत्यूपासून वांचवूं अशी माझ्याशीं
आणभाक करा. १४ तेव्हां त्या पुरुषांनीं तिला म्हटलें,
तुम्हीं कोणीं ही आपली गोष्ट बाहेर फोडिली नाहीं तर
तुमच्या प्राणांसाठीं आम्ही आमचे प्राण देऊं; आणि परमे-
श्वर आम्हांस हा देश देईल तेव्हां आम्ही तुझ्याशीं दयेनें व
खरेपणानें वागूं. १५ तेव्हां तिनें त्यांस खिडकींतून दोरानें
नगराबाहेर उतरिलें; कारण तिचें घर गांवकुसास लागून होतें;
तेथें ती राहत असे. १६ तिनें त्यांस सांगितलें कीं
तुमचा पाठलाग करणाऱ्यांनीं तुम्हांस गांठूं नये म्हणून
तुम्ही त्या डोंगराकडे जाऊन तेथें तीन दिवस लपून
राहा; तितक्या अवधींत तुमचे पाठलाग करणारे परत-
तील; मग तुम्ही मार्गस्थ व्हा. १७ ते पुरुष तिला
म्हणाले, तूं आमच्याकडून जी आणभाक करविली
आहे तिच्यासंबंधानें आम्हांस दोष न लागो. १८ पाहा,
आम्ही या देशीं येऊं तेव्हां ज्या खिडकींतून तूं
आम्हांस उतरिलें तिला हा किरमिजी धागा बांध;
आणि या तुझ्या घरीं आपलीं मातापितरें, भाऊबंद
आणि आपल्या पितृकुळांतलीं इतर सर्व माणसें जमा
कर. १९ त्या समयीं कोणीं तुझ्या घराच्या दारा-
बाहेर रस्त्यांत गेला तर त्याच्या रक्तपाताचा दोष
त्याच्याच माथीं राहील, आमच्याकडे त्याचा दोष
येणार नाहीं; घरामध्यें तुझ्याबरोबर जे राहतील
त्यांजवर कोणाचा हात पडला तर त्यांच्या रक्तपाताचा
दोष आमच्या माथीं. २० जर का तूं ही गोष्ट कोठें
बाहेर फोडिली तर आमच्याकडून जी आणभाक तूं
करविली आहे तीपासून आम्ही मुक्त होऊं. २१ ती
म्हणाली, तुमच्या सांगण्याप्रमाणेंच होईल. तिनें त्यांस
निरोप दिल्यावर ते मार्गस्थ झाले; नंतर तिनें किरमिजी
रंगाचा धागा आपल्या खिडकीस बांधिला. २२ ते जाऊन
डोंगरावर पोहंचले, आणि त्यांचा पाठलाग करणारे
परतून जात तोंपर्यंत तेथें तीन दिवस राहिले; त्यांचा
पाठलाग करणारांनीं वाटेंत चोहोंकडे शोध केला, पण
ते त्यांस सांपडले नाहींत. २३ मग ते दोघे पुरुष
पहाड उतरून नूनाचा पुत्र यहोशवा याजकडे परत
गेले आणि आपलें सगळें वर्तमान त्यांनीं त्यास
सांगितलें. २४ ते यहोशवास म्हणाले, हा सर्व देश

परमेश्वरानें आपल्या हातीं खरोखर दिला आहे; आणखी
या देशाचे सर्व रहिवासी आपल्यामुळें विरघळल्या-
सारखे झाले आहेत.
१ यहोशवा पहाटेस उठला आणि सर्व इस्राएलां-
३ सह शिट्टिमाहून कूच करून यार्देनतीरीं आला;
ती उतरून पलीकडे जाण्यापूर्वी तेथें त्यांनीं मुक्काम
केला. २ तीन दिवसांनंतर अमलदारांनीं छावणींत
फिरून ३ लोकांस अशी आज्ञा केली कीं तुमचा देव
परमेश्वर याच्या कराराचा कोश लेवीय याजक उचलून
नेतांना तुम्ही पाहाल तेव्हां तळ हालवून त्याच्या पाठो-
पाठ जा; ४ पण कोशाच्या व तुमच्यामध्यें सुमारें दोन
हजार हात मोजून अंतर ठेवा; त्याच्या फार जवळ
जाऊं नका, म्हणजे ज्या वाटेनें तुम्हांस जावयाचें ती
तुम्हांला दिसेल; कारण अद्यापपावेतों ह्या वाटेनें तुम्ही
कधीं गेलां नाहीं. ५ मग यहोशवानें लोकांस सांगितलें
कीं शुद्ध व्हा, कारण उद्यां परमेश्वर तुमच्यामध्यें अद्भुत
कृत्यें करणार आहे. ६ नंतर यहोशवानें याजकांस
सांगितलें कीं कराराचा कोश उचलून घेऊन लोकांच्या
पुढें चला त्याप्रमाणें ते तो घेऊन लोकांच्या पुढें
चालले. ७ परमेश्वर यहोशवास म्हणाला, आज मी
सर्व इस्राएल लोकांदेखत तुझी थोरवी वाढविण्यास
आरंभ करितों, म्हणजे मी जसा मोशाच्या बरोबर
होतों तसाच तुझ्याहि बरोबर आहें हें त्यांस कळून
येईल. ८ कराराचा कोश वाहणारे याजक यांस अशी
आज्ञा कर कीं जेव्हां तुम्ही यार्देनेंतील पाण्याच्या
कडेशीं पोहंचाल तेव्हां यार्देनेंत उभे राहा.
९ मग यहोशवानें इस्राएल लोकांस सांगितलें,
जवळ येऊन परमेश्वर तुमचा देव याचें म्हणणें ऐका.
१० यहोशवा म्हणाला, जिवंत देव तुमच्यामध्यें आहे,
आणि कनानी, हित्ती, हिव्वी, परिज्जी, गिर्गाशी, अमोरी
व यबूसी यांस तो तुमच्यापुढून खात्रीनें हाकून देईल हें
यावरून तुम्हांस कळून येईल. ११ अखिल पृथ्वीचा जो
प्रभु त्याच्या कराराचा कोश तुमच्यापुढें यार्देनेंत प्रवेश
करीत आहे. १२ तर आतां इस्राएल वंशांतून बारा पुरुष
निवडा, प्रत्येक वंशांतून एकएक. १३ अखिल पृथ्वीचा
जो प्रभु परमेश्वर याच्या कराराचा कोश वाहणाऱ्या
याजकांचे पाय यार्देनेच्या पाण्यास लागतांच वरून
वाहत येणारें यार्देनेचें पाणी थांबून जमेल व त्याची रास
होईल. १४ सर्व लोक यार्देनेपलीकडे जाण्यासाठीं आपल्या
डेऱ्यांतून निघाले तेव्हां कराराचा कोश वाहणारे याजक
लोकांच्यापुढें चालले; १५ कराराचा कोश वाहणारे
यार्देनेपाशीं येऊन पोहंचले आणि त्यांचे पाय कडेच्या
पाण्यांत बुडाले (सुगीच्या दिवसांत यार्देन नदी दुथडी
भरून वाहत असते); १६ तेव्हां जें पाणी वरून
वाहत येत होतें तें बऱ्याच अंतरावर म्हणजे सारताना-
जवळील आदाम नगरापाशीं एकवटून चढलें आणि
त्याची रास झाली, आणि जें पाणी अराबाचा समुद्र
म्हणजे क्षार समुद्र याकडे वाहत जात होतें तें अगदीं
हटलें; आणि ते सर्व लोक यरीहोसमोर पार उतरून
गेले. १७ परमेश्वराच्या कराराचा कोश वाहणारे
याजक यार्देनेच्या मध्यभागीं कोरड्या जमिनीवर स्थिर
उभे राहिले, आणि सर्व इस्राएल लोक कोरड्या
जमिनीवरून पार निघून गेले; या प्रकारें झाडून सारें
राष्ट्र यार्देनेपलीकडे निघून गेलें.
१ त्या राष्ट्रांतील झाडून सारे लोक यार्देने-
४ पलीकडे गेले तेव्हां परमेश्वरानें यहोशवास सांगितलें,
२ लोकांतून वंशामागें एक असे बारा पुरुष निवड
३ आणि त्यांस अशी आज्ञा दे: यार्देनेच्या मध्य-
भागांतून म्हणजे याजकांचे पाय जेथें स्थिर झाले होते
तेथून बारा धोंडे उचलून आपल्याबरोबर पलीकडे
घेऊन जा आणि आज रात्रीं ज्या स्थळीं तुमचा
मुक्काम होईल तेथें ने ठेवा. ४ मग यहोशवानें इस्राएल
लोकांतील वंशामागें एक असे जे बारा पुरुष तयार
केले होते त्यांस बोलाविलें. ५ यहोशवा त्यांस म्हणाला,
तुम्ही आपला देव परमेश्वर याच्या कराराच्या कोशा-
समोर यार्देनेच्या मध्यभागीं जाऊन इस्राएल वंशांच्या
संख्येप्रमाणें एकएक धोंडा उचलून आपल्या खांद्या-
वर घ्या, ६ हें तुमच्यामध्यें चिन्हादाखल होईल, आणि
पुढें तुमचीं मुलेंबाळें विचारितील कीं या धोंड्यांचें
प्रयोजन काय? ७ तेव्हां तुम्ही त्यांस सांगा कीं यार्देनेचें

पाणी परमेश्वराच्या कराराच्या कोशापुढें दुभंग
झालें; तो यार्देनेंतून पलीकडे जात असतांना यार्देनेच्या
पाण्याचे दोन भाग झाले; या प्रकारें हे धोंडे इस्राएल
लोकांस कायमचें स्मारक होतील. ८ यहोशवाच्या
या आज्ञेप्रमाणें इस्राएल लोकांनीं केलें; परमेश्वरानें
यहोशवाला सांगितलें होतें त्याप्रमाणें त्यांनीं इस्राएल
वंशांच्या संख्येप्रमाणें बारा धोंडे यार्देनेच्या मध्य-
भागांतून उचलिले आणि जेथें त्यांनीं मुक्काम केला तेथें
त्यांनीं ते आपल्याबरोबर आणून ठेविले; ९ आणि
यार्देनेच्या मध्यभागीं कराराचा कोश वाहणाऱ्या
याजकांचे पाय जेथें स्थिर झाले होते तेथें यहोशवानें
बारा धोंडे उभे केले; ते अद्यापि तेथें आहेत.
१० लोकांस जें सांगावयाची आज्ञा परमेश्वरानें
यहोशवास केली होती तें सर्व आटपेपर्यंत कराराचा
कोश वाहणारे याजक यार्देनेच्या मध्यभागीं उभे
राहिले; इकडे लोक त्वरेने पार उतरून गेले. ११ झाडून
सारे लोक उतरून गेल्यावर त्यांच्यादेखत परमेश्वराचा
कोश आणि याजक पलीकडे गेले. १२ रऊबेनी,
गादी आणि मनश्शाचा अर्धा वंश हे मोशाच्या आज्ञे-
प्रमाणें सशस्त्र होऊन इस्राएल लोकांच्यापुढें उतरून
पलीकडे गेले; १३ युद्धासाठीं सज्ज झालेले सुमारें
चाळीस हजार पुरुष परमेश्वरासमोर नदी उतरून
यरीहोजवळच्या मैदानांत जाऊन पोहंचले. १४ त्या
दिवशीं परमेश्वरानें सर्व इस्राएलांदेखत यहोशवाची
थोरवी वाढविली; म्हणून जसे ते मोशाचें भय धरीत
तसेंच त्यांनीं यहोशवाचें भय त्याच्या सगळ्या
हयातीत धरिलें.

१५ परमेश्वरानें यहोशवास सांगितलें, १६ आज्ञा-
पटाचा कोश वाहणारे याजक यांस आज्ञा दे कीं
त्यांनीं यार्देनेंतून वर यावें. १७ त्याप्रमाणें यहोशवानें
याजकांस आज्ञा केली कीं यार्देनेंतून निघून वर या.
१८ परमेश्वराच्या कराराचा कोश वाहणारे याजक
यार्देनाच्या मध्यभागांतून निघून वर आले आणि
त्यांनीं आपलीं पावलें उचलून कोरड्या जमिनीवर
ठेविलीं तेव्हां यार्देनेचें पाणी मूळ ठिकाणीं आलें आणि
पूर्ववत् दोन्ही थडी भरून वाहूं लागलें. १९ पहिल्या
महिन्याच्या दशमीस इस्राएल लोकांनीं यार्देनेंतून
निघून यरीहोच्या पूर्वसीमेवरील गिल्गाल येथें डेरे
दिले. २० जे बारा धोंडे यार्देनेंतून उचलून आणिले
होते ते यहोशवानें गिल्गाल येथें उभे केले. २१ तो
इस्राएल लोकांस म्हणाला कीं पुढें तुमचीं मुलेंबाळें
आपआपल्या वडिलांस विचारितील, या धोंड्यांचें
प्रयोजन काय? २२ तेव्हां तुम्ही त्यांस सांगा कीं
इस्राएल लोक या यार्देनेंतून कोरड्या जमिनीवरून चालून
पार आले. २३ कारण तुमचा देव परमेश्वर यानें
आम्ही उतरून पार जात तोंपर्यंत आमच्यापुढून
तांबडा समुद्र हटवून कोरडा केला, त्याप्रमाणें त्यानें
यार्देनेचेंहि पाणी तुम्ही उतरून पार जात तोंपर्यंत
तुमच्यापुढून हटवून कोरडी जमीन केली; २४ यावरून
पृथ्वीवरील सर्व देशांचे लोक जाणतील कीं परमे-
श्वराचा हात समर्थ आहे; आणि तुमचा देव परमेश्वर
याचा धाक त्यांना निरंतर वाटेल.

५ १ परमेश्वरानें यार्देनेचें पाणी आटविलें आणि
इस्राएल लोक पलीकडे कसे गेले हें यार्देनेच्या
पश्चिमेकडे राहणाऱ्या अमोऱ्यांच्या सर्व राजांनीं
ऐकलें, तेव्हां त्यांच्या भीतीनें त्यांच्या काळजाचें पाणी-
पाणी झालें आणि त्यांच्यांत कांहीं हिंमत राहिली नाहीं.

२ त्या समयीं परमेश्वरानें यहोशवास सांगितलें,
गारगोटीच्या सुऱ्या करून पुनरपि इस्राएल लोकांची
सुंता कर. ३ त्याप्रमाणें यहोशवानें गारगोटीच्या सुऱ्या
बनवून अग्रत्वचा हें नांव दिलेल्या टेकडीपाशीं
इस्राएल लोकांची सुंता केली. ४ यहोशवानें सुंता
केली याचें कारण हेंच कीं युद्धास लायक असे मिसर
देशांतून निघालेले सगळे पुरुष मिसरांतून निघाल्यावर
वाटेंत रानांत मरून गेले होते. ५ जे पुरुष मिसरांतून
निघाले त्या सर्वांची सुंता झाली होती, पण मिसरांतून
बाहेर निघाल्यावर रानांत वाटेनें जे लोक जन्मले
होते त्यांची सुंता झाली नव्हती. ६ कारण इस्राएल
लोक रानांत चाळीस वर्षे भ्रमण करीत राहिले होते,
तितक्या अवधींत सर्व राष्ट्र म्हणजे अर्थात् युद्धास

लायक असे पुरुष मिसरांतून निघाले होते त्यांनीं
परमेश्वराचें सांगणें न ऐकल्यामुळें त्यांचा संहार
झाला होता; परमेश्वरानें त्यांस शपथपूर्वक सांगितलें
होतें कीं जो देश मीं तुमच्या पूर्वजांस आणभाक
करून देऊं केला आहे आणि ज्यांत दुधामधाचे
प्रवाह वाहत आहेत तो मी तुमच्या दृष्टीस पडूं देणार
नाहीं. ७ त्यांच्या जागीं त्यांचीं जीं मुलें त्यानें उत्पन्न
केलीं होतीं त्यांची यहोशवानें सुंता केली; कारण
वाटेनें त्यांची सुंता झाली नव्हती म्हणून ते बेसुनत
राहिले होते. ८ त्या सर्व राष्ट्राची सुंता करणें संपल्या-
वर ते बरे होत तोंपर्यंत छावणींत आपआपल्या
ठिकाणीं राहिले. ९ मग परमेश्वर यहोशवास म्हणाला,
मिसरी तुमचा उपहास करीत असत तो आज मीं
तुमच्यापासून दूर केला आहे. यास्तव त्या जागेस
गिल्गाल (लोटून देणें) म्हणतात.

१० इस्राएल लोकांनीं गिल्गालांत तळ दिल्यावर
यरीहोजवळच्या मैदानांत चतुर्दशीस संध्याकाळीं
वल्हांडण सण केला. ११ वल्हांडणाच्या दुसरे दिवशीं
त्या देशांत उत्पन्न झालेल्या धान्याची बेखमीर
भाकर आणि हुरडा त्यांनीं खाल्ला. १२ ज्या दिवशीं
त्यांनीं त्या देशांतला उपज खाल्ला त्याच दिवशीं मान्ना
बंद झाला, तो पुनः इस्राएल लोकांस मिळाला नाहीं;
त्या वर्षीं त्यांनीं कनान देशांतलें उत्पन्न खाल्लें.

१३ यहोशवानें यरीहोजवळ असतां वर दृष्टि
केली तों कोणी पुरुष आपल्या हातीं उपसलेली तरवार
घेऊन पुढें उभा आहे असें त्याच्या नजरेस पडलें.
यहोशवानें जवळ जाऊन त्यास विचारिलें, तूं आमच्या
पक्षाचा कीं आमच्या वैऱ्यांच्या पक्षाचा? १४ तो
म्हणाला, नाहीं; मी येथें परमेश्वराचा सेनानायक या
नात्यानें आलों आहें. तेव्हां यहोशवानें त्यास साष्टांग
प्रणिपात करून म्हटलें, प्रभूची आपल्या दासास काय
आज्ञा आहे? १५ परमेश्वराचा सेनानायक यहो-
शवास म्हणाला, आपल्या पायांतलें पायतण काढ;
कारण ज्या भूमीवर तूं उभा आहेस ती पवित्र आहे.
यहोशवानें तसें केलें.

१ इस्राएल लोकांच्या भीतीनें यरीहोच्या
६ सर्व वेशी मजबूत लावून घेतल्या होत्या;
कोणाला बाहेर जातां येईना कीं आंत येतां
येईना. २ परमेश्वर यहोशवास म्हणाला, पाहा, मीं
यरीहो, त्याचा राजा व त्याचे पराक्रमी वीर तुझ्या हातीं
दिले आहेत. ३ तुम्ही सगळे योद्धे या नगरास एक
वेळ प्रदक्षिणा घाला, असें सहा दिवस करीत राहा.
४ कोशापुढें सात याजकांनीं सात रणशिंगें घेऊन
चालावें; सातवे दिवशीं तुम्हीं नगरास सात प्रदक्षिणा
घालाव्या आणि याजकांनीं रणशिंगें फुंकावीं. ५ रणशिंग
फुंकीत असतां त्याचा दीर्घनाद कानीं पडतांच सर्व
लोकांनीं मोठा जयघोष करावा; म्हणजे नगराचा तट
जागच्या जागीं कोसळेल आणि मग सर्वांनीं नीट समोर
चालून जावें. ६ मग नूनाचा पुत्र यहोशवा यानें
याजकांस बोलावून सांगितलें, कराराचा कोश उचलून
घ्या आणि परमेश्वराच्या कोशापुढें सात याजकांनीं सात
रणशिंगें घेऊन चालावें. ७ त्यानें लोकांस सांगितलें,
चला, नगरास प्रदक्षिणा घाला, आणि हत्यारबंद
लोकांनीं परमेश्वराच्या कोशापुढें चालावें. ८ यहोशवानें
लोकांला असें सांगितल्यावर सात याजक परमे-
श्वरापुढें सात रणशिंगें घेऊन फुंकीत चालले आणि
परमेश्वराच्या कराराचा कोश त्यांच्या मागोमाग चालला.
९ हत्यारबंद लोक रणशिंगें वाजविणाऱ्या याजकां-
पुढें चालले, पिछाडीचे लोक कोशाच्या मागोमाग
चालले आणि याजक रणशिंगें फुंकीत चालले.
१० मग यहोशवानें लोकांस अशी आज्ञा केली कीं मी
तुम्हांस सांगे तोंपर्यंत जयघोष करूं नका, त्यांच्या कानीं
आवाज जाऊं देऊं नका; तुम्ही आपल्या तोंडावाटे
चकार शब्द काढूं नका; आज्ञा होतांच जयघोष करा.
११ या प्रकारें परमेश्वराच्या कोशाची नगरासभोंवतीं एक
वेळ प्रदक्षिणा झाली; मग त्यांनीं छावणींत येऊन
मुक्काम केला.

१२ यहोशवा मोठ्या पहाटेस उठला आणि
याजकांनीं परमेश्वराचा कोश उचलून घेतला. १३ सात
याजक रणशिंगें घेऊन परमेश्वराच्या कोशापुढें तीं एक-

सारखीं फुंकीत चालले आणि हत्यारबंद लोक त्यांच्या-
पुढें चालले; पिछाडीचे लोक परमेश्वराच्या कोशामागें
चालले आणि याजक रणशिंगें फुंकीत चालले. १४ ते
दुसरे दिवशींहि नगरास प्रदक्षिणा करून छावणींत परत
आले; असें त्यांनीं सहा दिवस केलें; १५ पण सातवे
दिवशीं अगदीं पहाटेस उठून त्यांनीं अशाच प्रकारें
सात प्रदक्षिणा त्या नगरास घातल्या; त्या दिवशीं मात्र
त्यांनीं त्या नगरास सात प्रदक्षिणा घातल्या. १६ सातव्या
वेळीं याजक रणशिंगें फुंकीत असतां यहोशवा लोकांस
म्हणाला, जयघोष करा, कारण परमेश्वरानें हें नगर
तुमच्या हातीं दिलें आहे; १७ हें नगर व त्यांत जें
कांहीं असेल तें सर्व परमेश्वरास अर्पण करावें; मात्र रहाब
वेश्येस आणि जीं कोणीं तिच्या घरीं असतील त्यांस
जीवंत ठेवावयाचें, कारण आपण पाठविलेल्या हेरांस
तिनें लपवून ठेविलें होतें. १८ समर्पित वस्तूंपासून
सर्वथा दूर राहा, त्या समर्पण केल्यावर त्यांतली
एकादी तुम्ही घ्याल तर इस्राएलाच्या छावणीवर शाप
आणून तिला संकटांत घालाल. १९ सर्व सोनें, रुपें
आणि पितळेचीं व लोखंडाचीं पात्रें परमे-
श्वरास अर्पण होत; तीं परमेश्वराच्या भांडारांत गेलीं
पाहिजेत. २० तेव्हां लोकांनीं जयघोष केला आणि
याजक रणशिंगें वाजवीत राहिले; रणशिंगांचा शब्द
ऐकल्यावर लोकांनीं मोठा जयघोष केला आणि तट
जागच्याजागीं कोसळला; मग लोकांनीं नीट आप-
आपल्यासमोर त्या नगरांत चालून जाऊन तें हस्तगत
केलें. २१ पुरुष, स्त्रिया, तरुण, वृद्ध, गुरेंमेंढरें,
गाढवें वगैरे जें कांहीं त्या नगरांत होतें तें समर्पित
असल्यामुळें त्या सर्वांचा त्यांनीं तरवारीनें समूळ
नाश केला. २२ तेव्हां जे दोन पुरुष तो देश हेरा-
वयास गेले होते त्यांस यहोशवा म्हणाला, तुम्ही आण-
भाक केल्याप्रमाणें त्या वेश्येच्या घरीं जाऊन तिला
आणि जें कांहीं तिचें असेल तें बाहेर काढा. २३ तेव्हां
त्या तरुण हेरांनीं आंत जाऊन रहाबेस, तिच्या आई-
बापांस, भाऊबंदांस, तिचें जें कांहीं होतें तें व तिच्या
सर्व आप्तजनांला बाहेर काढून इस्राएल लोकांच्या
छावणीबाहेर नेऊन ठेविलें. २४ मग त्यांनीं तें नगर
व त्यांत जें कांहीं होतें तें सर्व आग लावून जाळिलें;
मात्र सोनें, रुपें आणि पितळेचीं व लोखंडाचीं पात्रें हीं
त्यांनीं परमेश्वराच्या मंदिराच्या भांडारांत ठेविलीं.
२५ यहोशवानें रहाब वेश्या, तिच्या पित्याचें कुटुंब
व तिचीं कोणीं होतीं तीं सगळीं वांचविलीं; तिचा वंश
आजवर इस्राएल लोकांत वसत आहे; कारण जे हेर
यरीहो हेरावयास यहोशवानें पाठविले होते, त्यांस
तिनें लपवून ठेविलें. २६ त्या समयीं यहोशवानें
इस्राएल लोकांस अशी शपथ घातली कीं जो कोणी
पुढें होऊन हें यरीहो नगर वसवील त्याला परमे-
श्वराचा शाप लागेल; तो त्याचा पाया घालील तेव्हां
त्याचा ज्येष्ठ पुत्र मरेल आणि तो त्याच्या वेशी उभारील
तेव्हां त्याचा कनिष्ठ पुत्र मरेल. २७ याप्रमाणें परमेश्वर
यहोशवाबरोबर राहिला, आणि त्याची कीर्ति सर्व
देशभर पसरली.

७ १ ह्या प्रसंगीं इस्राएल लोकांनीं समर्पित वस्तू-
संबंधानें अपराध केला; यहूदा वंशांतील आखान बिन
कर्मी बिन जब्दी बिन जेरह यानें समर्पित वस्तूंपैकीं
कांहीं ठेविल्या तेव्हां इस्राएल लोकांवर परमेश्वराचा
कोप भडकला.

२ बेथेलच्या पूर्वेस बेथ-आवेनाजवळ आय नगर
आहे तेथें यहोशवानें यरीहोहून मनुष्य पाठवून त्यांस
सांगितलें कीं जाऊन तो देश हेरा. तेव्हां त्यांनीं
जाऊन आय हेरिलें. ३ ते यहोशवाकडे परत येऊन
म्हणाले, सर्वांस तेथें जावयाला नको, फक्त दोनतीन
हजार पुरुषांनीं जाऊन आय हस्तगत करावें; तेथें
सर्व लोकांस जाण्याचे कष्ट देण्याची जरूरी नाहीं; कारण
ते लोक थोडे आहेत; ४ म्हणून सुमारें तीन हजार
पुरुष तिकडे रवाना झाले; पण आय येथल्या मनुष्यां-
पुढून त्यांस पळ काढावा लागला. ५ आय येथील
मनुष्यांनीं त्यांतले अजमासें छत्तीस लोक मारून टाकिले
आणि आपल्या वेशीपासून शबारीमापर्यंत त्यांचा पाठ-
लाग करून उतरणीपर्यंत त्यांस मारीत नेलें; त्यामुळें
लोकांच्या काळजाचें पाणीपाणी झालें. ६ यहोशवानें

आपलीं वस्त्रें फाडिलीं आणि तो व इस्राएलाचे वडील
जन संध्याकाळपर्यंत परमेश्वराच्या कोशापुढें उपडे पडून
राहिले; आणि त्यांनीं आपल्या डोक्यांत धूळ घातली.
७ यहोशवा म्हणाला, हायहाय! हे प्रभो देवा,
आम्हांस अमोऱ्यांच्या हातीं देऊन आमचा निःपात
करावा म्हणून तूं ही सर्व प्रजा यार्देनेपार कां आणिली?
आम्ही समाधान मानून यार्देनेपलीकडे राहिलों असतों
तर बरें होतें! ८ हे प्रभो, इस्राएलनें आपल्या शत्रूंस
पाठ दाखविली तर मी आतां काय सांगूं! ९ आतां
कनानी लोक आणि देशांतले सर्व रहिवासी हें ऐकून
आम्हांस घेरितील आणि पृथ्वीवरून आमचें नांव
नाहींसें करितील; तर तूं आपलें थोर नाम राखण्या-
साठीं काय करणार? १० तेव्हां परमेश्वर यहोशवाला
म्हणाला, ऊठ, असा उपडा कां पडलास? ११ इस्राएल
लोकांनीं पाप केलें आहे; मीं त्यांच्याशीं केलेला करार
त्यांनीं मोडिला आहे; समर्पित वस्तूंपैकीं कांहीं त्यांनीं
घेतल्या आहेत; एवढेंच नव्हे तर त्यांनीं चोरी व
लबाडीहि केली आहे, आणि त्या वस्तु आपल्या
सामानामध्यें ठेविल्या आहेत. १२ यास्तव इस्राएल
लोकांस आपल्या शत्रूंपुढें टिकाव धरवत नाहीं, ते
आपल्या शत्रूंस पाठ दाखवितात, कारण ते शापग्रस्त
झाले आहेत; तुमच्यामधून त्या समर्पित वस्तु नष्ट
होत तोंपर्यंत तुमच्याबरोबर मी एथून पुढें असणार नाहीं.
१३ तर ऊठ, लोकांस शुद्ध कर; त्यांस सांग: उद्यांच्या-
साठीं तुम्ही सर्व शुद्ध व्हा; कारण इस्राएलाचा देव
परमेश्वर म्हणतो, हे इस्राएला, तुझ्यामध्यें समर्पित
वस्तु आहेत; तुमच्यांतून त्या समर्पित वस्तु तुम्ही दूर
करणार नाहीं तोंपर्यंत तुला तुझ्या वैऱ्यांपुढें टिकाव
धरवणार नाहीं. १४ सकाळीं तुम्हांतल्या एकएक
वंशानें जवळ येऊन उभें राहावें; ज्या वंशाची चिठी
निघेल त्यांतल्या एकएका गोत्रानें जवळ यावें आणि
ज्या गोत्राची चिठी निघेल त्यांतल्या एकएका घराण्यानें
जवळ यावें; आणि ज्या घराण्याची चिठी निघेल
त्यांतल्या एकएका पुरुषानें जवळ यावें. १५ ज्याच्या-
पाशीं तो समर्पित वस्तु सांपडेल त्याला त्याच्या
सर्वस्वासह जाळून टाकावें; कारण त्यानें परमेश्वराचा
करार मोडिला आहे, आणि इस्राएलामध्यें मूढपणाचें
काम केलें आहे.

१६ यहोशवानें मोठ्या पहाटेस उठून इस्राएलाचा
एकएक वंश जवळ उभा केला, तेव्हां यहूदाच्या
वंशाची चिठी निघाली; १७ मग त्यानें यहूदाचें एक-
एक गोत्र जवळ आणिलें, तेव्हां जेरह गोत्राची चिठी
निघाली; आणि जेरहाच्या गोत्रांतील एकएक घराणें
जवळ आणिलें तेव्हां जब्दीच्या घराण्याची चिठी
निघाली; १८ मग त्या घराण्यांतील एकएका पुरुषास
जवळ आणिलें तेव्हां यहूदा वंशांतील आखान बिन
कर्मी बिन जब्दी बिन जेरह याला पकडिलें. १९ तेव्हां
यहोशवा आखानास म्हणाला, मुला, इस्राएलाचा देव
परमेश्वर यास थोर मान; त्याजपुढें आपलें पाप
कबूल कर; तूं काय केलें तें मला सांग, मजपासून
कांहीं लपवूं नको. २० आखान यहोशवास म्हणाला,
मीं खरोखर इस्राएलाचा देव परमेश्वर याचा अपराध
केला आहे, मीं जें कांहीं केलें आहे तें हें: २१ लुटी-
मध्यें एक चांगला शिनारी झगा, दोनशें शेकेल रुपें
आणि पन्नास शेकेल वजनाची एक सोन्याची वीट हीं
माझ्या दृष्टीस पडलीं तेव्हां मीं त्यांचा अभिलाष करून
तीं घेतलीं; तीं पाहा, माझ्या डेऱ्यांत जमिनींत पुरलेलीं
आहेत आणि झग्याखालीं चांदी आहे. २२ तेव्हां
यहोशवानें जासूद पाठविले, ते डेऱ्याकडे धावत गेले;
आणि झगा त्याच्या डेऱ्यांत छपविलेला असून त्याच्या
खालीं रुपें ठेविलें आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें.
२३ त्यांनीं तीं डेऱ्यांतून काढून यहोशवा आणि सर्व
इस्राएल लोक यांजकडे आणून परमेश्वरापुढें ठेविलीं.
२४ तेव्हां यहोशवानें व त्याच्याबरोबरच्या सर्व
इस्राएलांनीं आखान बिन जेरह यास व त्याच्याबरोबर
तें रुपें, तो झगा व ती सोन्याची वीट, त्याचे कन्यापुत्र,
त्याचे बैल, गाढवें, शेरडेंमेंढरें, त्याचा डेरा व त्याचें
जें कांहीं होतेंनव्हतें तें सर्व आखोर खिंडींत नेलें.
२५ तेव्हां यहोशवा म्हणाला, तूं आम्हांस कां ताप
दिला? परमेश्वर तुला आज ताप देणार. मग सर्व

इस्राएलांनीं त्यास दगडमार केला व तीं सर्व अग्नीनें
जाळून त्यांवर दगड टाकिले. २६ त्यांवर त्यांनीं
एक मोठी दगडांची रास केली ती आजवर आहे.
तेव्हां परमेश्वराचा भडकलेला कोप शमला. यावरून
त्या स्थलास आजवर आखोर (ताप देणारी) खिंड
म्हणत आले आहेत.

८ १ मग परमेश्वर यहोशवास म्हणाला, भिऊं
नको, कचरूं नको; ऊठ, सर्व योद्धे आपल्याबरोबर
घेऊन आय नगरावर चढाई कर; आय नगराचा
राजा, त्याचें नगर आणि त्याचा देश हीं मीं तुझ्या हातीं
दिलीं आहेत; २ यरीहो नगर आणि त्याचा राजा
यांचें जसें तूं केलें तसेंच आय व त्याचा राजा यांचें
कर; मात्र तेथली हातीं लागेल ती मालमत्ता व गुरेंढोरें
हीं तुम्ही आपणांसाठीं लूट म्हणून घ्या; नगराच्या मागल्या
बाजूनें लोकांस दबा धरून बसण्यास सांग. ३ त्याप्रमाणें
यहोशवानें सर्व योद्ध्यांसह आय नगरावर चढाई करून
जाण्याची तयारी केली: यहोशवानें तीस हजार पराक्रमी
वीर पुरुष निवडून रातोरात पाठविले. ४ त्यानें त्यांस
आज्ञा केली कीं ऐका, नगराच्या पिछाडीस दबा धरून
बसा; नगरापासून फार दूर जाऊं नका, पण तुम्ही सर्व
तयारींत असा; ५ मी आणि माझ्याबरोबरचे सर्व
लोक त्या नगराजवळ येऊं, आणि ते पूर्वींप्रमाणें आपल्या-
वर हल्ला करण्यास येतील तेव्हां आपण त्यांच्यासमोरून
पळावयाला लागूं. ६ असे आपण त्यांस चाळवीत नगरा-
बाहेर दूर नेऊं तोंपर्यंत ते आपल्या पाठीस लागतील; ते
म्हणतील, पूर्वींप्रमाणेंच हे आपल्याला भिऊन पळत
आहेत; असें आपण त्यांच्यापुढें पळूं लागूं; ७ मग दबा
धरणाऱ्यांनीं उठून हल्ला करावा आणि तें नगर काबीज
करावें; कारण तुमचा देव परमेश्वर तें तुमच्या हातीं
देणार; ८ तुम्ही तें नगर हस्तगत करितांच त्यास आग
लावा; परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें करा; पाहा, मीं तुम्हांस
सर्व सांगितलें आहे. ९ यहोशवानें त्यांस रवाना केलें
तेव्हां ते आयच्या पश्चिम बाजूस बेथेल व आय यांच्या
दरम्यान दबा धरण्यासाठीं जाऊन राहिले; यहोशवा
त्या रात्रीं आपल्या लोकांबरोबरच राहिला.

१० यहोशवानें अगदीं पहाटेस उठून लोकांचा
जमाव केला आणि तो व इस्राएलाचे वडील जन
लोकांच्या आघाडीस आय नगराकडे चालले. ११ त्यांज-
बरोबर सर्व योद्धे कूच करून गेले, आणि आय नगरा-
जवळ जाऊन पोहंचल्यावर त्यांनीं त्यासमोर उत्तरेस
तळ दिला; ते व आय नगर यांच्यामध्यें एक खोरें
होतें. १२ त्यानें सुमारें पांच हजार पुरुष नगराच्या
पश्चिमेस बेथेल व आय यांच्या दरम्यान दबा धरावयास
ठेविले. १३ नगराच्या उत्तरेस कोणतें सैन्य जावयाचें
आणि पश्चिमेस कोणीं दबा धरावयाचा हें ठरवून
यहोशवा त्या रात्रीं त्या खोऱ्यांत राहिला. १४ आयच्या
राजानें हें पाहिलें तेव्हां तो व त्याच्या नगरचे सगळे
लोक पहाटेस लवकर उठून इस्राएल लोकांशीं सामना
करण्यास अराबासमोर ठरविलेल्या वेळीं गेले;
नगराच्या पिछाडीस लोक दबा धरून आहेत हें त्या
राजाच्या गांवींहि नव्हतें. १५ मग यहोशवा व सर्व
इस्राएल लोक मोड झाल्याचें मिष करून रानाच्या
वाटेनें पळाले. १६ त्यांचा पाठलाग करण्यासाठीं
नगरच्या सर्व लोकांस एकत्र बोलावण्यांत आलें; त्यांनीं
यहोशवाचा पाठलाग केला व त्यानें त्यांस नगरापासून
बरेंच दूर चाळवीत नेलें. १७ इस्राएलामागून गेला
नाहीं असा कोणी पुरुष आय व बेथेल येथें राहिला
नाहीं; त्यांनीं तें नगर खुलें टाकून इस्राएलाचा पाठ-
लाग केला. १८ तेव्हां परमेश्वर यहोशवास म्हणाला,
तुझ्या हातची बरची आय नगराकडे कर, कारण तें मीं
तुझ्या हातीं देतों. यहोशवानें आपल्या हातीं असलेली
बरची नगराकडे केली. १९ तेव्हां त्यानें आपला हात
उगारितांच दबा धरणाऱ्यांनीं लगबगीनें उठून धावत
जाऊन नगरांत प्रवेश केला व तें काबीज केलें, आणि
त्वरा करून त्या नगरास आग लाविली. २० आय येथील
पुरुषांनीं मागें वळून पाहिलें तों नगराचा धूर आकाशांत
चढतांना त्यांस दिसला, तेव्हां त्यांस त्या बाजूला
किंवा त्या बाजूला पळण्याची ताकद राहिली नाहीं; इकडे
जे लोक रानाच्या मार्गानें पळत होते त्यांनीं उलटून
आपला पाठलाग करणाऱ्यांची पाठ धरिली. २१ दबा

धरून बसणाऱ्यांनीं नगर हस्तगत केलें आहे व त्याचा
धूर वर येत आहे, असें यहोशवा व सर्व इस्राएल
लोक यांनीं पाहिलें तेव्हां त्यांनीं मागें उलटून
आयकरांचा संहार केला. २२ त्यांच्याशीं सामना
करण्यास दुसरी टोळीहि नगरांतून निघाली; असे ते
या बाजूनें व त्या बाजूनें इस्राएल लोकांच्या कचाटींत
सांपडले; त्यांनीं त्यांचा संहार केला; त्यांतला कोणी
जीवंत राहिला नाहीं किंवा निसटून गेला नाहीं.
२३ आय नगरच्या राजास त्यांनीं जीवंत धरून
यहोशवाकडे आणिलें. २४ मैदानांत म्हणजे रानांत
त्यांनीं त्यांचा पाठलाग केला होता तेथें इस्राएलानें आय
नगरच्या सर्व रहिवाश्यांचा संहार केला, आणि तर-
वारीच्या धारेखालीं सांपडून त्यांचा साफ फडशा
उडाला; मग इस्राएल लोक आय नगरांत परत आले व
त्यावर त्यांनीं तरवार चालविली. २५ त्या दिवशीं
सर्व स्त्रीपुरुष मिळून जीं माणसें पडलीं तीं बारा हजार
होतीं, म्हणजे अर्थात् आय नगरांतलीं सगळीं माणसें.
२६ आय येथील सर्व रहिवाश्यांचा निःपात होई-
पर्यंत यहोशवानें ज्या हातानें आपली बरची नगरा-
कडे केली होती तो मागें घेतला नाहीं. २७ परमे-
श्वरानें यहोशवास सांगितल्याप्रमाणें इस्राएल लोकांनीं
त्या नगरचीं गुरेंढोरें व इतर मालमत्ता मात्र स्वतांसाठीं
लूट म्हणून घेतली. २८ तेव्हां यहोशवानें आय नगरास
आग लाविली व त्याची कायमची नासधूस करून
टाकिली; आजवर तें तसेंच उजाड पडलें आहे.
२९ आय नगरच्या राजास यहोशवानें संध्याकाळपर्यंत
झाडाला टांगिलें होतें आणि सूर्यास्ताच्या वेळीं त्याच्या
आज्ञेनें त्याचें प्रेत झाडावरून उतरून नगराच्या वेशी-
पाशीं त्यांनीं टाकिलें आणि त्याजवर एक धोंड्यांची मोठी
रास केली, ती आजपर्यंत आहे.

३० मग यहोशवानें इस्राएलाचा देव परमेश्वर
याच्याप्रीत्यर्थ एबाल पर्वतावर वेदी बांधिली;
३१ परमेश्वराचा सेवक मोशे यानें इस्राएलास आज्ञा
दिली होती तीप्रमाणें, मोशाच्या नियमशास्त्रांत
लिहिलें आहे त्याप्रमाणें, म्हणजे न घडलेल्या
दगडांची वेदी त्यानें बांधिली; धोंड्यांस लोखंडाचा
स्पर्श म्हणून झाला नव्हता; त्या वेदीवर त्यांनीं परमे-
श्वराला होमबलि अर्पिले आणि शांत्यर्पणें केलीं.
३२ त्याच ठिकाणीं यहोशवानें इस्राएल लोकांदेखत
त्या धोंड्यांवर मोशानें लिहिलेल्या नियमशास्त्राची नक्कल
उतरिली. ३३ मग सर्व देशीपरदेशी इस्राएल लोक
आपले वडील पुरुष, सरदार व न्यायाधीश यांसह
परमेश्वराच्या कराराचा कोश वाहणाऱ्या लेवीय
याजकांच्यासमोर त्या कोशाच्या अलीकडे व पलीकडे
उभे राहिले; अर्धे लोक गरिज्जीम पर्वतासमोर व अर्धे
लोक एबाल पर्वतासमोर उभे राहिले. परमेश्वराचा सेवक
मोशे यानें आज्ञा दिली होती कीं इस्राएल लोकांस
प्रथम आशीर्वाद द्यावा. ३४ मग आशीर्वादाचीं व
शापाचीं वचनें नियमशास्त्रांत लिहिलीं आहेत तीं सर्व
यहोशवानें वाचून दाखविलीं. ३५ मोशानें दिलेल्या
सगळ्या आज्ञा इस्राएल लोकांच्या एकंदर मंडळीसमोर
व त्यांच्या स्त्रिया, मुलेंबाळें व त्यांच्यामध्यें राहणारे
परदेशीय यांच्यासमोर वाचून दाखविल्या; त्यांतला
एक शब्दहि सोडिला नाहीं.

९ हें ऐकून हित्ती, अमोरी, कनानी, परिज्जी,
हिव्वी आणि यबूसी यांचे जे राजे यार्देनेच्या
डोंगराळ देशांत, तळवटींत आणि लबानोनासमोर
महासागराच्या तीरीं राहत होते, २ ते सगळे एकोपा
करून यहोशवा व इस्राएल लोक यांच्याशीं लढण्यास
जमा झाले.

३ यहोशवानें यरीहो आणि आय या नगरांचें
काय केलें हें गिबोनाच्या रहिवाश्यांनीं ऐकलें;
४ तेव्हां त्यांनीं कपटाची युक्ति योजिली; त्यांनीं
वाटेसाठीं शिधा घेतला आणि आपल्या गाढवांवर जुनीं
गोणतारें व जुने, फाटलेले, ठिगळें मारिलेले द्राक्षारसाचे
बुधले लादिले; ५ त्यांनीं आपल्या पायांत जुने व
ठिगळांचे जोडे घातले, अंगांत जुनेपुराणे कपडे
चढविले; त्यांच्या शिदोरीच्या भाकरी वाळून
त्यांचा भुगा झाला होता. ६ ते गिल्गालाच्या

१ अथवाः वकिलांचें सोंग घेतलें.

छावणींत यहोशवाकडे जाऊन त्यास व इस्राएल
लोकांस म्हणाले, आम्ही दूर देशाहून आलों
आहों, आम्हांबरोबर करारमदार करा. ७ इस्राएल
लोकांनीं त्या हिव्व्यांस म्हटलें, कोण जाणे कदाचित्
तुम्ही आमच्यांत वस्ती करणारे असाल; तुमच्याबरोबर
करारमदार कसा करावा? ८ ते यहोशवास म्हणाले,
आम्ही तुझे दास आहों. यहोशवानें त्यांस विचारिलें,
तुम्ही कोण व कोठून आलां? ९ ते म्हणाले, तुझे दास
दूर देशाहून तुझा देव परमेश्वर याचें नांव ऐकून आले
आहेत; त्याची कीर्ति व त्यानें मिसरांत कायकाय केलें
हें सर्व आम्हीं ऐकलें आहे; १० आणि यार्देनेच्या पूर्वेस
अमोऱ्यांचे दोन राजे म्हणजे हेशबोननिवासी राजा
सीहोन आणि अष्टारोथनिवासी बाशानाचा राजा ओग,
यांचें त्यानें काय केलें हें आम्ही जाणून आहों.
११ तेव्हां आमचीं वडील माणसें आणि आमच्या
देशाचे सर्व रहिवासी आम्हांस म्हणाले, वाटेसाठीं
आपल्याबरोबर शिदोरी घेऊन त्यांची भेट घेण्यास जा
आणि त्यांस सांगा कीं आम्ही तुमचे दास आहों; आतां
आम्हांशीं करारमदार करा. १२ आम्ही तुम्हांकडे
येण्यास निघालों त्या दिवशीं आम्हीं घराहून अगदीं
ऊनऊन भाकरी घेतल्या होत्या पण त्या आतां अगदीं
वाळून गेल्या आहेत व त्यांचा भुगा झाला आहे.
१३ हे द्राक्षारसाचे बुधले आम्हीं भरून घेतले तेव्हां
ते नवे होते, पण ते आतां फाटूनतुटून गेले आहेत; हे
आमचे कपडे व आमचे जोडे फार लांबच्या प्रवासानें
जीर्ण झाले आहेत. १४ तेव्हां त्या पुरुषांनीं परमेश्वराला
विचारिल्यावांचून त्यांचें अन्न ग्रहण केलें. १५ मग यहो-
शवानें त्यांजशीं सल्ला करून त्यांस जीवंत ठेवण्याचा
करार केला; मंडळीच्या सरदारांनीहि त्यांजशीं आण-
भाक केली. १६ त्यांच्याशीं करार झाल्यावर तीन
दिवसांनीं त्यांस समजलें कीं हे आपले शेजारी असून
आपल्यामध्यें राहणारे आहेत. १७ नंतर इस्राएल
लोक कूच करून तिसऱ्या दिवशीं त्यांच्या नगरांस
जाऊन पोहंचले. त्यांच्या नगरांचीं नांवें हीं: गिबोन,
कफीरा, बैरोथ व किर्याथ-यारीम. १८ इस्राएल लोकांनीं
त्यांस मारून टाकिलें नाहीं, कारण मंडळीच्या सरदारांनीं
इस्राएलाचा देव परमेश्वर याच्या नामानें आणभाक
केली होती; पण सर्व मंडळीनें सरदारांविरुद्ध कुरकुर
केली. १९ तेव्हां ते सर्व सरदार मंडळीस म्हणाले,
आम्हीं इस्राएलाचा देव परमेश्वर याच्या नामानें
त्यांजशीं आणभाक केली आहे; तर आतां आम्हांस
त्यांस हात लावितां येत नाहीं. २० त्यांच्याशीं आम्ही
असेंच वागणार; त्यांस आम्ही जीवंत राखणार; तसें
न केल्यास त्यांजशीं आणभाक केल्याकारणानें आम्ही
क्रोधपात्र होऊं. २१ तेव्हां सरदारांनीं त्यांस
सांगितलें कीं त्यांस जीवंत सोडा; सरदारांनीं त्यांस
सांगितल्याप्रमाणें ते लोक सर्व मंडळीचे लाकूडतोड्ये
व पाणक्ये झाले. २२ यहोशवानें त्यांस बोलावून म्हटलें,
तुम्ही आमच्यामध्यें राहत असून आम्ही फार दूरचे
आहों असें सांगून आम्हांस कां फसविलें?
२३ तर आतां तुम्हांस असा शाप आहे कीं तुमच्यां-
तल्या कोणास दास होणें चुकावयाचें नाहीं; तुम्ही
माझ्या देवाच्या मंदिरीं लाकूडतोड्ये व पाणक्ये होऊन
राहाल. २४ ते यहोशवास म्हणाले, हा सर्व देश
तुम्हांस देईन आणि तुम्हांसमोर देशाच्या सर्व रहि-
वाश्यांचा संहार करीन असें तुझा देव परमेश्वर यानें
आपला सेवक मोशे यास सांगितलें होतें, हें खरोखर
तुझ्या दासांच्या कानीं आलें; तुमच्यामुळें आम्हांस
आमच्या जिवाची भीति पडली म्हणून असलें काम
आम्हीं केलें. २५ आतां पाहा, आम्ही तुझ्या हातीं
आहों; तुला बरें व ठीक दिसेल तसें आमचें
कर. २६ त्यानें त्यांची विनंति मान्य केली व त्यांस
इस्राएल लोकांच्या हातांतून सोडविलें; त्यांनीं त्यांचा
संहार केला नाहीं. २७ यहोशवानें त्या दिवशीं
मंडळीसाठीं आणि परमेश्वर निवडणार होता त्या
स्थानाच्या वेदीसाठीं त्यांस लाकूडतोड्ये व पाणक्ये
नेमून ठेविलें, तसे ते आजवर आहेत.

१ यहोशवानें आय नगर घेऊन त्याचा
१० सर्वस्वीं विध्वंस केला, आणि जसें त्यानें
यरीहोचें व त्याच्या राजाचें केलें तसेंच आय

नगराचें व त्याच्या राजाचें केलें, आणि गिबोनाचे
रहिवासी इस्राएल लोकांशीं सख्य करून त्यांच्यामध्यें
जाऊन राहिले; हें सर्व यरुशलेमाचा राजा अदोनीसदेक
यानें ऐकलें; २ तेव्हां त्यांस दहशत पडली, कारण
गिबोन हें मोठें नगर असून राजधान्यांपैकीं होतें आणि
तें आय नगराहून मोठें असून तेथले सर्व लोक बलाढ्य
होते. ३ तेव्हां यरुशलेमाचा राजा अदोनीसदेक यानें
हेब्रोनचा राजा होहाम, यर्मूथचा राजा पिराम,
लाखीशचा राजा याफीय आणि एग्लोनचा राजा
दबीर यांस निरोप पाठविला कीं ४ मजकडे येऊन
मला कुमक करा, आपण गिबोनास मार देऊं; कारण
त्यानें यहोशवाशीं व इस्राएल लोकांशीं सख्य केला आहे.
५ तेव्हां यरुशलेम, हेब्रोन, यर्मूथ, लाखीश, आणि
एग्लोन येथल्या पांच अमोरी राजांनीं आपल्या सेना
जमा करून चढाई केली आणि गिबोनासमोर तळ
देऊन ते त्याच्याशीं लढूं लागले. ६ तेव्हां गिबोनाच्या
रहिवाश्यांनीं गिल्गालच्या छावणींत यहोशवाला सांगून
पाठविलें कीं आपल्या दासांवरला आपला हात मागें
घेऊं नको; त्वरेनें आम्हांकडे येऊन आमचा बचाव
कर; कारण डोंगरवटीचे सर्व अमोरी राजे एकत्र जमून
आम्हांवर आले आहेत. ७ तेव्हां यहोशवा आपले
योद्धे व सर्व शूर वीर यांस बरोबर घेऊन गिल्गाल
येथून निघाला. ८ परमेश्वर यहोशवास म्हणाला, त्यांची
भीति धरूं नको; मीं त्यांस तुझ्या हातीं दिलें आहे;
त्यांतला एकहि पुरुष तुझ्यापुढें टिकाव धरणार नाहीं.
९ यहोशवा त्यांजवर एकाएकीं चाल करून आला;
तो रातोरात गिल्गालाहून कूच करून गेला. १० परमे-
श्वरानें इस्राएलापुढें त्यांची गाळण केली व त्यांनीं
गिबोनापाशीं त्यांची अगदीं कत्तल उडवून बेथ-होरोनच्या
घाटांत त्यांचा पाठलाग केला आणि अजेका व मक्केदा
येथपर्यंत ते त्यांना मारीत गेले. ११ ते इस्राएलापुढून
पळून बेथ-होरोनच्या उतरणीवर आल्यावर अजेकास
जाऊन पोहंचेपर्यंत परमेश्वरानें आकाशांतून मोठाल्या
गारा त्यांजवर पाडून त्यांस ठार केलें; इस्राएल लोकांनीं
तरवारीनें मारिलें त्यांहून अधिक लोक गारांनीं मेले.

१२ परमेश्वरानें अमोरी लोकांस इस्राएल लोकांच्या
हातीं दिलें तेव्हां यहोशवा परमेश्वराशीं बोलला;
इस्राएलासमक्ष तो असें म्हणालाः

हे सूर्या, तूं गिबोनावर स्थिर हो;
हे चंद्रा, तूं अयालोनच्या खोऱ्यावर स्थिर हो.
१३ तेव्हां सूर्य स्थिर झाला आणि चंद्र थांबला,
त्या राष्ट्रानें आपल्या वैऱ्यांचें पुरें उसनें फेडीपर्यंत
ते थांबले.

याशार नामक ग्रंथांत ही कथा लिहिली आहेना?
सूर्य आकाशमंडळांत थांबला आणि जवळजवळ चार
प्रहर अस्त पावला नाहीं. १४ असा दिवस पूर्वीं कधीं
आला नाहीं व पुढेंहि येणार नाहीं; परमेश्वरानें मानवाचा
शब्द ऐकला; परमेश्वर इस्राएलासाठीं लढला.

१५ मग यहोशवा सर्व इस्राएलांसह गिल्गालच्या
छावणीकडे परत गेला.

१६ ते पांच राजे पळून जाऊन मक्केदाजवळील एका
गुहेंत लपून राहिले. १७ ते पांच राजे मक्केदा येथील
गुहेंत लपले आहेत असें कोणीं यहोशवास कळविलें.
१८ तेव्हां यहोशवानें सांगितलें कीं गुहेच्या तोंडावर
मोठमोठे धोंडे लोटा आणि तिच्यावर मनुष्यांचा पहारा
ठेवा; १९ पण तुम्ही थांबूं नका, आपल्या शत्रूंचा
पाठलाग करून त्यांच्या पिछाडीच्या लोकांस मारून
टाका, त्यांस त्यांच्या नगरांस पोहंचूं देऊं नका; कारण
तुमचा देव परमेश्वर यानें त्यांस तुमच्या हातीं दिलें आहे.
२० यहोशवा आणि इस्राएल लोक यांनीं त्यांची मोठी
कत्तल करून त्यांचा संहार करण्याचें काम आटोपिलें;
त्यांतले कांहीं लोक बचावून तटबंदीच्या नगरांत गेले,
२१ तेव्हां सर्व लोक मक्केदाच्या छावणीस यहोशवाकडे
सुखरूप आले; इस्राएलाविरुद्ध कोणींहि शब्दसुद्धां
काढिला नाहीं. २२ तेव्हां यहोशवानें आज्ञा केली कीं
गुहेचें तोंड उघडून त्या पांच राजांस मजकडे घेऊन या.
२३ त्यांनीं तसें केलें आणि यरुशलेम, हेब्रोन, यर्मूथ,
लाखीश आणि एग्लोन येथील पांच राजांना गुहेंतून काढून
त्याच्यापुढें आणिलें. २४ ते त्या राजांस यहोशवाकडे
घेऊन आले तेव्हां सर्व इस्राएल लोकांस बोलावून

आणून तो आपल्याबरोबरच्या योद्धयांच्या नायकांस
म्हणाला, जवळ येऊन आपले पाय या राजांच्या
मानांवर ठेवा; त्यांनीं जवळ येऊन त्यांच्या मानांवर
पाय दिले. २५ यहोशवा त्यांस म्हणाला, भिऊं नका,
कचरूं नका, हिंमत धरा, धीर धरा; कारण ज्यांशीं
तुम्ही लढाल त्या तुमच्या सर्व शत्रूंचें परमेश्वर असेंच
करणार. २६ नंतर यहोशवानें त्या राजांस ठार मारून
पांच वृक्षांवर त्यांस टांगिलें, आणि ते संध्याकाळपर्यंत
त्या वृक्षांवर लटकत राहिले. २७ सूर्यास्तसमयीं यहोशवाच्या
आज्ञेवरून लोकांनीं त्यांस त्या वृक्षांवरून उतरिलें आणि
ज्या गुहेंत ते लपले होते तींत त्यांस टाकिलें, आणि
त्या गुहेच्या तोंडीं त्यांनीं मोठमोठे धोंडे लोटून
ठेविले; आजवर ते तसेच आहेत.

२८ त्या दिवशीं यहोशवानें मक्केदा घेऊन तर-
वारीनें त्याचा सर्वस्वीं संहार केला, त्याच्या राजासहि
मारून टाकिलें आणि जेवढे म्हणून प्राणी तेथें होते
त्यांपैकीं कोणालाहि जीवंत राहूं दिलें नाहीं; त्यानें
यरीहोच्या राजाचें जसें केलें तसेंच मक्केदाच्या
राजाचें केलें.

२९ मग मक्केदाहून निघून सर्व इस्राएलांस बरोबर
घेऊन यहोशवा लिब्ना येथें गेला व त्याशीं लढला;
३० परमेश्वरानें तें नगर व त्याचा राजा त्यास
इस्राएलांच्या हातीं दिलें आणि यहोशवानें त्याचा
व त्या नगरांतल्या सर्व प्राण्यांचा तरवारीनें संहार
केला; त्यांतल्या कोणाला जीवंत राहूं दिलें नाहीं;
यरीहोच्या राजाचें जसें त्यानें केलें तसेंच त्यानें
येथल्याहि राजाचें केलें.

३१ मग लिब्ना सोडून सर्व इस्राएलांसह यहोशवा
लाखीश येथें गेला आणि त्यासमोर तळ देऊन त्याशीं
लढला; ३२ परमेश्वरानें लाखीश इस्राएलाच्या हातीं
दिलें व त्यांनीं तें दुसऱ्या दिवशीं घेतलें. लिब्ना येथील
सर्व प्राण्यांचा त्यानें तरवारीनें संहार केला होता
तसाच लाखीश येथेंहि केला.

३३ तेव्हां गेजरचा राजा होराम हा लाखीशाला
कुमक करण्यासाठीं चालून आला; तेव्हां यहोशवानें
त्याचा व त्याच्या लोकांचा एवढा संहार केला कीं
त्यांतल्या कोणासहि जीवंत राहूं दिलें नाहीं.

३४ मग लाखीश सोडून यहोशवा सर्व इस्राएलांसह
एग्लोन येथें गेला; त्यासमोर तळ देऊन ते त्याशीं
लढले; ३५ त्याच दिवशीं त्यांनीं तें नगर घेतलें आणि
त्याचा तरवारीनें संहार केला; लाखीशांत जसा सर्व
प्राण्यांचा सर्वस्वीं संहार केला होता तसाच त्यानें त्या
दिवशीं एग्लोनांतहि केला.

३६ मग एग्लोन सोडून यहोशवा सर्व इस्राएलांसह
हेब्रोनास गेला; आणि ते त्याशीं लढले; ३७ त्यांनीं तें
नगर घेतलें आणि तें, त्याचा राजा, त्याचीं सर्व नगरें
आणि त्यांतले सर्व प्राणी यांचा तरवारीनें संहार केला;
यहोशवानें एग्लोनांतल्यासारखेंच हेब्रोनांतहि कोणास
जीवंत राहूं दिलें नाहीं; त्यानें त्याचा आणि त्यांतल्या
सर्व प्राण्यांचा सर्वस्वीं संहार केला.

३८ मग यहोशवा सर्व इस्राएलांसह मागें वळून
दबीरास गेला आणि त्याशीं लढला; ३९ तेथला
राजा व त्याचीं सर्व नगरें त्यानें हस्तगत करून
त्यांचा तरवारीनें संहार केला; त्यांत जेवढे प्राणी
होते त्यांचा त्यानें सर्वस्वीं संहार केला, कोणाला
जीवंत राहूं दिलें नाहीं. हेब्रोनचें आणि लिब्ना व
त्यांचे राजे यांचें जसें त्यानें केलें तसेंच दबीर व
त्याचा राजा यांचेंहि केलें.

४० या प्रकारें यहोशवानें त्या सर्व देशाचा म्हणजे
पहाडी प्रदेश, दक्षिण देश, तळवट व उतरण हे सर्व
प्रांत आणि त्यांचे राजे यांचा धुव्वा उडविला, कोणाला
जीवंत राहूं दिलें नाहीं; इस्राएलाचा देव परमेश्वर
याच्या आज्ञेप्रमाणें सर्व प्राण्यांचा त्यानें सर्वस्वीं
संहार केला. ४१ यहोशवानें कादेश-बर्ण्यापासून
गज्जापर्यंतचा मुलूख व गिबोनापर्यंतचा सर्व गोशेन
प्रांत यांचा धुव्वा उडविला. ४२ हे सर्व राजे
व त्यांचे देश यहोशवानें एकाच वेळेस घेतले; कारण
इस्राएलाचा देव परमेश्वर इस्राएलांतर्फे लढला. ४३
मग यहोशवा सर्व इस्राएलांसह गिल्गालच्या छावणीस
परत गेला.

११ १ हें ऐकून हासोराचा राजा याबीन यानें
मादोनाचा राजा योबाब आणि शिम्रोनाचा
राजा व अक्षाफाचा राजा यांस, २ त्याप्रमाणेंच
उत्तर दिशेस डोंगराळ प्रदेशांत, किन्नेरोथाच्या दक्षिणे-
कडील अराबांत, तळवटींत आणि पश्चिमेकडील दोराच्या
माळांत असलेल्या राजांस, ३ आणि पूर्वेकडले व
पश्चिमेकडले कनानी, अमोरी, हित्ती, परिज्जी व डोंगर-
वटीचे यबूसी आणि हर्मोन पहाडाच्या तळाशीं मिस्पा
प्रांतांत राहणारे हिव्वी यांस बोलावणें पाठविलें.
४ तेव्हां ते सगळे आपआपल्या सेना घेऊन सागर-
तीरींच्या वाळूसारखे अगणित असे बाहेर निघाले;
त्यांच्याबरोबर घोडे आणि रथ पुष्कळ होते. ५ त्या सर्व
राजांनीं एकवट होऊन इस्राएलाशीं लढण्यासाठीं
मेरोम सरोवरापाशीं तळ दिला. ६ तेव्हां परमेश्वर
यहोशवास म्हणाला, त्यांस भिऊं नको; कारण उद्यां
त्या वेळीं मी त्या सर्वांस इस्राएलाच्या हातीं देऊन
त्यांचा संहार करीन; तेव्हां तूं त्यांच्या घोड्यांच्या
मांड्यांच्या शिरा तोडून टाक व त्यांचे रथ अग्नीनें
जाळ. ७ तेव्हां यहोशवा सर्व योद्ध्यांसह मेरोम सरो-
वरापाशीं अकस्मात् दाखल होऊन त्यांजवर तुटून
पडला. ८ परमेश्वरानें त्यांस इस्राएलाच्या हातीं दिलें;
त्यांनीं त्यांस मार देऊन सीदोन महानगरापर्यंत व
मिस्रपोथ-माईमापर्यंत आणि पूर्वेस मिस्पा खोऱ्यापर्यंत
त्यांचा पाठलाग केला व त्यांस मारून टाकिलें; त्यांतला
एकहि कोणी जीवंत राहूं दिला नाहीं. ९ परमेश्वरानें
सांगितलें होतें त्याप्रमाणें यहोशवानें त्यांचें केलें;
त्यानें त्यांच्या घोड्यांच्या मांड्यांच्या शिरा तोडिल्या व
त्यांचे रथ अग्नीनें जाळिले.

१० त्या समयीं यहोशवानें मागें परतून हासोर
घेतलें, व त्याच्या राजास तरवारीनें वधिलें; पूर्वी हासोर
हें त्या सर्व राज्यांमध्यें प्रमुख होतें. ११ जेवढे प्राणी
त्यांत राहत होते त्या सर्वांचा त्यांनीं तरवारीनें
सर्वस्वीं संहार करून कोणताहि प्राणी जीवंत ठेविला
नाहीं; आणि त्यानें हासोर त्यास आग लावून तें जाळून
टाकिलें. १२ परमेश्वराचा सेवक मोशे याच्या आज्ञेप्रमाणें
त्या राजांचीं सर्व नगरें व त्यांचे सर्व राजे हस्तगत करून
व त्यांचा यहोशवानें तरवारीनें संहार करून सर्वस्वीं
विध्वंस केला. १३ तथापि जीं नगरें टेकड्यांवर
वसलीं होतीं तीं इस्राएल लोकांनीं जाळिलीं नाहींत;
मात्र हासोर नगर यहोशवानें जाळिलें. १४ त्या नगरां-
तील सर्व मालमत्ता व गुरेंढोरें इस्राएल लोकांनीं लुटून
नेलीं, पण तरवार चालवून मनुष्यांचा निःपात केला,
एकहि प्राणी जीवंत राहूं दिला नाहीं. १५ परमेश्वरानें
आपला सेवक मोशे यास आज्ञा केल्याप्रमाणें मोशानें
यहोशवाला सांगितलें; आणि त्याप्रमाणें यहोशवानें
केलें. परमेश्वरानें मोशाला सांगितलेली कोणतीहि गोष्ट
केल्यावांचून त्यानें सोडिलें नाहीं.

१६ या प्रकारें यहोशवानें डोंगरी मुलूख, सर्व दक्षिण
देश, सर्व गोशेन प्रांत, तळवट, अराबा, इस्राएलाचा
डोंगराळ प्रदेश व त्याची तळवट हीं घेतलीं;
१७ सेईरच्या वाटेवरील हालाक डोंगरापासून हर्मोन
पर्वततळींच्या लबानोन खोऱ्यांतील बाल-गाद येथवरचा
सर्व मुलूख व त्यांतले सर्व राजे त्यानें हस्तगत केले,
आणि त्यांचा मोड करून त्यांस जिवें मारिलें. १८ त्या
सर्व राजांशीं यहोशवानें बहुत काळ युद्ध केलें.
१९ गिबोनांत राहणाऱ्या हिव्व्यांखेरीज इस्राएल
लोकांशीं सख्य केला असें एकहि नगर नव्हतें;
तीं सर्व त्यांनीं लढून घेतलीं. २० कारण परमे-
श्वराचा असा मानस होता कीं त्यानें मोशाला
सांगितल्याप्रमाणें त्यांचा निखालस निःपात करावा;
त्यांस कांहीं दयामाया न दाखवितां त्यांचा संहार
करावा, म्हणून त्यानें त्यांचीं मनें कठीण केलीं आणि
ते इस्राएलाशीं युद्ध करण्यास बाहेर निघाले.

२१ त्या वेळीं यहोशवानें पहाडी देशांत जाऊन
हेब्रोन, दबीर व अनाब यांतल्या आणि यहूदा व
इस्राएल यांच्या सर्व डोंगराळ प्रदेशांत राहणाऱ्या
अनाकी लोकांचा नाश केला आणि त्यांचा व त्यांच्या
नगरांचा सर्वस्वीं निःपात केला. २२ इस्राएल लोकांच्या
देशांत कोणी अनाकी जिवंत राहिला नाहीं; मात्र गज्जा,
गथ व अश्दोद यांतले थोडे लोक जिवंत राहिले.

२३ परमेश्वरानें मोशाला सांगितलें होतें त्याप्रमाणें
यहोशवानें सर्व देश घेतला आणि तो इस्राएल
लोकांच्या वंशाच्या नियमाप्रमाणें त्यांस वांटून वतन
करून दिला; तेव्हां देशास युद्धापासून विसावा
मिळाला.

## १२

१ यार्देनेपलीकडे उगवतीकडील आर्णोन
खोऱ्यापासून हर्मोन पर्वतापर्यंत असलेले देश
आणि पूर्वेकडील अराबांतील सर्व देश इस्राएल
लोकांनीं लढून काबीज केले; त्यांच्या राजांचीं नांवें
हीं: २ आर्णोन खोऱ्याच्या कडेवरल्या अरोएर नगरा-
पासून व त्याच खोऱ्याच्या मध्यभागापासून अम्मोनी
लोकांच्या सीमेवरील यब्बोक नदीपर्यंत असलेल्या
अर्ध्या गिलादावर, ३ आणि पूर्वेस किन्नेरोथ सरोवरापासून
बेथ-यशिमोथाच्या वाटेवरल्या सपाटीपर्यंत म्हणजे क्षार-
समुद्रापर्यंत असलेला प्रांत आणि दक्षिणेस पिसगाच्या
उतरणीपर्यंतचा सर्व प्रदेश यांवर अमोऱ्यांचा राजा
हेशबोननिवासी सीहोन याची सत्ता होती; ४ अवशिष्ट
राहिलेल्या रेफाई लोकांतला बाशानाचा राजा ओग,
हा अष्टारोथ व एद्रेई येथें राहत असे; ५ हर्मोन पर्वत,
सलका, गशूरी, व माकाथी यांच्या सीमेपर्यंतचा
सगळा बाशान प्रांत आणि हेशबोनाचा राजा
सीहोन याच्या मुलखाची सीमा येथवर त्याची सत्ता
अर्ध्या गिलादावर होती. ६ परमेश्वराचा सेवक मोशे
आणि इस्राएल लोक यांनीं त्याचा मोड केला होता;
आणि परमेश्वराचा सेवक मोशे यानें त्याचा देश
रऊबेनी, गादी व मनश्शाचा अर्धा वंश यांस वतन
करून दिला होता.

७ यार्देनेच्या पश्चिमेस लबानोन खोऱ्यांतील बाल-
गादापासून सेईरास जाणाऱ्या घाटांतील हालाक पर्वता-
पर्यंत ज्या राजांचे देश होते व ज्यांस यहोशवा व इस्राएल
लोक ह्यांनीं मारिलें त्यांचीं नांवें हीं: हे देश यहोशवानें
इस्राएल लोकांच्या वंशांप्रमाणें व विभागांप्रमाणें त्यांस
वतनादाखल वांटून दिले. ८ हित्ती, अमोरी, कनानी,
परिज्जी, हिव्वी, यबूसी हे डोंगराळ प्रदेश, तळवट, अराबा,
उतरण, रान आणि दक्षिण देश यांत राहत होते; ९ यरी-
होचा राजा एक, बेथेलच्या बाजूस जें आय त्याचा राजा
एक, १० यरुशलेमाचा राजा एक, हेब्रोनाचा राजा
एक, ११ यर्मूथाचा राजा एक, लाखीशाचा राजा एक,
१२ एग्लोनाचा राजा एक, गेजेराचा राजा एक,
१३ दबीराचा राजा एक, गेदेराचा राजा एक, १४
हर्माचा राजा एक, अरादाचा राजा एक, १५ लिब्नाचा
राजा एक, अदुल्लामाचा राजा एक, १६ मक्केदाचा
राजा एक, बेथेलचा राजा एक, १७ तप्पूहाचा
राजा एक, हेफेराचा राजा एक, १८ अफेकाचा
राजा एक, लश्शारोनाचा राजा एक, १९ मादोनाचा
राजा एक, हासोराचा राजा एक, २० शिम्रोन-
मरोनाचा राजा एक, अक्षाफाचा राजा एक,
२१ तानखाचा राजा एक, मगिद्दोचा राजा एक,
२२ केदेशाचा राजा एक, कर्मेलाजवळील यकनामाचा
राजा एक, २३ दोराच्या डोंगरवटींतील दोराचा राजा
एक, गिल्गालच्या राष्ट्रांचा राजा एक, २४ तिरसाचा
राजा एक; हे सर्व राजे एकंदर एकतीस होते.

## १३

१ यहोशवा आतां फार वृद्ध व वयातीत
झाला, तेव्हां परमेश्वर त्याला म्हणाला, तूं वृद्ध
व वयातीत झाला आहेस आणि देशाचा बराच
भाग अजून ताब्यांत यावयाचा राहिला आहे. २ जे
प्रदेश बाकी राहिले आहेत ते हे: पलिष्ट्यांचा अवघा
प्रदेश, सारे गशूरी; ३ मिसरापुढील शीहोर नदीपासून
उत्तरेकडील एक्रोनाच्या सीमेपर्यंतचा कनान्यांचा
म्हणून मोडत असलेला प्रांत, तसेच पलिष्ट्यांचे पांच
सुभे म्हणजे गज्जा, अश्दोद, अष्कलोन, गथ व
एक्रोन; यांखेरीज, दक्षिणेकडले अव्वी, ४ अफेक व
अमोऱ्यांची सरहद्द येथपर्यंतचा कनान्यांचा सर्व देश व
सीदोन्यांचा मारा नामक देश; ५ आणि गिबली
यांचा देश, तसेंच उगवतीकडील हर्मोन पर्वताच्या
तळापासून, बाल-गादापासून हमाथाच्या घाटापर्यंत
सर्व लबानोन. ६ लबानोनापासून मिस्रपोथ-माईमपर्यंत
सीदोन्यांच्या डोंगराळ देशचे रहिवासी यांस मी इस्रा-
एल लोकांपुढून घालवून देईन; एवढें मात्र तूं कर कीं
माझ्या आज्ञेप्रमाणें चिठ्ठ्या टाकून त्यांचा देश इस्राएल

लोकांस वांटून दे. ७ हा देश नऊ वंश व मनश्शाचा
अर्धा वंश यांस वतनादाखल वांटून दे. ८ मनश्शाच्या
बाकीच्या अर्ध्या वंशास आणि रऊबेनी व गादी यांस
वतनाचा वांटा मिळून चुकला आहे; परमेश्वराचा सेवक
मोशे यानें पूर्वेस यार्देनेपलीकडे त्यांस आपण केलेल्या
ठरावाप्रमाणें वतन दिलें; ९ म्हणजे आर्णोन खोऱ्याच्या
बाजूस असलेलें अरोएर व खोऱ्यामधलें नगर यांपासून
गिबोनापर्यंतचा मेदबाचा सर्व पठाराचा प्रदेश, १०
अम्मोन्यांच्या हद्दीपर्यंतचीं हेशबोननिवासी अमोऱ्यांचा
राजा सीहोन याचीं सारीं नगरें, ११ गिलाद देश,
गशूरी व माकाथी यांचा सारा प्रांत, हर्मोन पर्वत आणि
सलकापर्यंतचा सर्व बाशान देश; १२ म्हणजे रेफाईतला
जो एकटाच वांचून राहिलेला अष्टारोथ व एद्रई येथें
राज्य करणारा ओग याचें सारें राज्य, येथल्या सर्वांचा
मोशानें मोड करून त्यांस देशांतून घालवून दिलें होतें.
१३ तरी इस्राएल लोकांनीं गशूरी व माकाथी यांस
त्यांच्या देशांतून घालविलें नाहीं म्हणून गशूरी व
माकाथी आजवर इस्राएलांत वस्ती करून आहेत.
१४ लेवी वंशास मात्र त्यानें कोणतेंहि वतन दिलें
नाहीं; कारण इस्राएलांचा देव परमेश्वर यानें सांगितल्या-
प्रमाणें परमेश्वरास वाहिलेलीं हव्यें हींच त्यांचा
वतनभाग होत.

१५ मोशानें रऊबेनी वंशास त्यांच्या कुळां-
प्रमाणें वतन दिलें. १६ त्यांचा मुलूख हा: आर्णोन
खोऱ्याच्या बाजूस असलेलें अरोएर व खोऱ्यामधलें
नगर यांजपासून मेदबाजवळचा सर्व पठार प्रदेश;
१७ पठारावरलें हेशबोन व त्याचीं सर्व नगरें, दीबोन,
बामोथ-बाल, बेथ-बालमोन; १८ याहस, कदेमोथ,
मेफाथ; १९ किर्याथईम, सिब्मा, खोऱ्यांतील पहाडावर
वसलेलें सरेथ शहर; २० बेथ-पौर, पिसगाच्या
उतरणी, बेथ-यशिमोथ; २१ आणि माळावरले सर्व
गांव, म्हणजे हेशबोनांत राज्य करणारा अमोऱ्यांचा
राजा सीहोन याचें सर्व राज्य; या राजास मोशानें ठार
मारिलें, आणि त्याच्याबरोबर त्या देशांत राहणारे
सीहोनचे अधिपति व मिद्यानाचे सरदार अवी, रेकेम,
सूर, हूर व रेबा यांसहि त्यानें मारिलें. २२ इस्राएल
लोकांनीं तरवारीनें ज्यांचा संहार केला त्यांतच बौराचा
पुत्र बलाम दैवज्ञ याचाहि वध केला. २३ रऊबेन
यांची सीमा यार्देनतीर ठरली. रऊबेनी यांचा वतन-
भाग त्यांच्या कुळांप्रमाणें नगरें आणि गांव यांसहित
हाच ठरला.

२४ मग मोशानें गाद वंशासहि त्यांच्या कुळांप्रमाणें
वतन दिलें. २५ त्यांचा मुलूख हा: याजेर, गिलादांतली
सर्व नगरें; आणि राब्बासमोरील अरोएरापर्यंतचा
अम्मोन्यांचा अर्धा देश; २६ हेशबोनापासून रामाथ-
मिस्पापर्यंतचा प्रदेश, बतोनीम महनाईमापासून
दबीरच्या हद्दीपर्यंतचा प्रदेश; २७ खोऱ्यांतील
बेथहाराम, बेथ-निम्रा, सुक्कोथ, साफोन, म्हणजे
हेशबोनाचा राजा सीहोन याच्या राज्याचा अवशिष्ट
भाग आणि यार्देनतीरींचा किन्नेरेथ सरोवरापर्यंतचा
यार्देनेच्या पूर्वेकडील प्रदेश. २८ गादी यांचें वतन
त्यांच्या कुळांप्रमाणें नगरें व गांव यांसह हेंच ठरलें.

२९ मग मोशानें मनश्शाच्या अर्ध्या वंशास वतन
दिलें होतें तें मनश्शाच्या अर्ध्या वंशास त्यांच्या कुळां-
प्रमाणें होतें. ३० त्यांचा मुलूख हा: महनाईमापासून
सगळा बाशान देश म्हणजे बाशानाचा राजा ओग याचें
सगळें राज्य आणि बाशानांतलीं याईरचीं साठ नगरें;
३१ गिलादचा अर्धा भाग, आणि बाशानाचा राजा
ओग याच्या राज्यांतलीं अष्टारोथ व एद्रई हीं नगरें
मनश्शाचा पुत्र माखीर याच्या वंशाचें म्हणजे माखीरच्या
अर्ध्या वंशाचें त्यांच्या कुळांप्रमाणें वतन ठरलें.

३२ यरीहोजवळ यार्देनेच्या पूर्वेस मवाबाच्या
मैदानांत मोशानें वांटून दिलेलीं वतनें हीं होत;
३३ पण लेवी वंशास मोशानें कांहींएक वतन दिलें
नाहीं; इस्राएलाचा देव परमेश्वर हाच त्यांच्या सांगण्या-
प्रमाणें त्यांचें वतन होय.

१४ १ एलाजार याजक, नूनाचा पुत्र यहोशवा
आणि इस्राएली वंशांच्या पितृकुळांचे प्रमुख
यांनीं विभागून दिलेले जे वतनभाग इस्राएल
लोकांस मिळाले ते हे: २ परमेश्वरानें साडेनऊ वंशां-

विषयीं मोशाच्या द्वारें दिलेल्या आज्ञेप्रमाणें त्यांचे
वतनभाग चिठ्या टाकून वांटले. ३ अडीच वंशांना
मोशानें यार्देनेच्या पूर्वेस वतन दिलेंच होतें; पण लेवी
वंशास त्यांच्याबरोबर कांहींएक वतन दिलें नव्हतें.
४ योसेफवंशाच्या दोन शाखा झाल्या होत्या, त्या मनश्शे
व एफ्राइम ह्या होत्या; पण त्या देशांत लेव्यांस कांहीं
विभाग दिला नाहीं, मात्र राहण्यास नगरें आणि पशु
व धन यांसाठीं कांहीं शिवारें दिलीं होतीं. ५ परमे-
श्वरानें मोशाला दिलेल्या आज्ञेस अनुसरून इस्राएल
लोकांनीं तो देश वांटून घेतला.

६ मग यहूदा वंशाचे लोक गिल्गालांत यहोशवाकडे
आले; आणि कनिज्जी यफुन्नेचा पुत्र कालेब त्यास
म्हणाला, परमेश्वरानें देवभक्त मोशे यास तुजविषयीं
आणि मजविषयीं कादेश-बर्ण्यांत काय सांगितलें होतें तें
तुला आठवत असेलच; ७ परमेश्वराचा सेवक मोशे
यानें मला हा देश हेरावयास कादेश-बर्ण्याहून पाठविलें,
तेव्हां मी चाळीस वर्षांचा होतों आणि माझ्या मनाच्या
समजुतीप्रमाणें मीं त्याजकडे बातमी आणली; ८ पण
माझे बांधव मजबरोबर गेले होते त्यांनीं लोकांच्या
काळजाचें पाणीपाणी होईल असें केलें; मीं मात्र आपला
देव परमेश्वर याचें पूर्णपणें अनुसरण केलें. ९ तेव्हां
त्या दिवशीं मोशानें आणभाक करून मला सांगितलें कीं
तूं माझा देव परमेश्वर याचें पूर्णपणें अनुसरण
केलें म्हणून ज्या भूमीला तुझा पाय लागला आहे ती
तुझें व तुझ्या वंशजांचें निरंतरचें वतन होईल.
१० आतां पाहा, परमेश्वरानें मोशाला हें सांगितलें त्यास
पंचेचाळीस वर्षें झालीं आहेत, इतक्या अवधींत इस्रा-
एल लोक रानांत भटकत असतां परमेश्वरानें आपल्या
वचनानुसार मला जीवंत ठेविलें आहे व मी आज
पंचाऐशीं वर्षांचा झालों आहें. ११ मोशानें मला पाठ-
विलें त्या दिवशीं माझ्यांत जितकी शक्ति होती तितकी
आजहि आहे; लढाई करण्याचें व येजा करण्याचें
सामर्थ्य माझ्यांत जसें त्या वेळीं होतें तसेंच
आजमितीसहि आहे. १२ तर त्या वेळीं परमेश्वरानें
सांगितल्याप्रमाणें हा डोंगर मला दे; त्या वेळीं तूं
ऐकलेंच होतें कीं तेथें अनाकी लोक राहत असून
तेथील नगरें मोठमोठीं व तटबंदीचीं आहेत; आतां
परमेश्वर मला साहाय्य असला तर त्याच्या म्हणण्याप्रमानें
मी त्यास तेथून घालवून देईन. १३ तेव्हां यहोशवानें
त्यास आशीर्वाद दिला; आणि यफुन्नेचा पुत्र कालेब यास
हेब्रोन नगर वतन करून दिलें. १४ या प्रकारें आजवर
कनिज्जी यफुन्नेचा पुत्र कालेब याचें हेब्रोन हें वतन
झालें आहे; कारण तो इस्राएलाचा देव परमेश्वर यास
पूर्णपणें अनुसरला. १५ पूर्वी हेब्रोनचें नांव किर्याथ-आर्बा
होतें; हा आर्बा अनाक्यांमध्यें अति थोर पुरुष होऊन
गेला, यानंतर त्या देशास युद्धापासून विसावा मिळाला.

१५ १ यहूदी वंशाला त्याच्या कुळाप्रमाणें चिठ्या
टाकून जो भाग मिळाला तो अदोमाच्या
सीमेपर्यंत आणि दक्षिणेकडे सीन रानापर्यंत
अगदीं दक्षिणेच्या सरहद्दीपर्यंत पसरला होता.
२ त्यांच्या दक्षिण सीमेस क्षारसमुद्राच्या दक्षिणेकडील
खाडीपासून आरंभ झाला; ३ ती तशीच अक्राब्बीम
नांवाच्या चढणीच्या दक्षिणेकडे निघून सीन रानाच्या
कडेनें कादेश-बर्ण्याच्या दक्षिणेस गेली असून हेस्रोना-
जवळून अद्दारावरून जाऊन कर्काकडे वळली आहे;
४ तेथून ती सीमा असमोनास जाऊन मिसरच्या
नाल्यापर्यंत निघाली आहे; तिचा शेवट समुद्राजवळ
झाला आहे; तुमची दक्षिण सीमा हीच. ५ त्यांची पूर्व
सीमा यार्देनेच्या मुखापर्यंत क्षारसमुद्र ठरली आहे.
उत्तर सीमा यार्देनेच्या मुखाजवळील समुद्राच्या
खाडीपासून सुरू होऊन, ६ बेथ-हाग्लाच्या चढावावरून
जाऊन बेथ-अराबाच्या उत्तरेकडे रऊबेनी बोहनच्या
खडकापर्यंत गेली आहे; ७ तेथून ती सीमा आखोर
खोऱ्यापासून दबीरापर्यंत जाऊन उत्तरेस गिल्गालाकडे
वळली आहे; हें गिल्गाल नदीच्या दक्षिणेस अदुम्मीमाच्या
चढावासमोर आहे. मग ती सीमा एन-शेमेश
नांवाच्या झऱ्याजवळून जाऊन तिचा शेवट एनरोगेलास
होतो. ८ तेथून ती सीमा हिन्नोमपुत्राच्या खिंडींतून यबूसी
चढणीच्या दक्षिण भागावर म्हणजे यरुशलेमावर चढून
जाऊन पश्चिमेकडे हिन्नोमाच्या खोऱ्यासमोर आणि

रेफाईम खोऱ्याच्या उत्तर टोकांस असलेल्या पहाडाच्या माथ्यावर जाऊन पोंचली आहे; ९ तेथून ती सीमा त्या पहाडाच्या माथ्यापासून नफ्तोहाच्या झऱ्यापर्यंत जाते व एफ्रोन डोंगरांतील नगरांवरून निघून तेथून बाला ऊर्फ किर्याथ-यारीम येथपर्यंत पोहंचते. १० तेथून ती सीमा बालाच्या पश्चिमेस वळसा घेऊन सेईर डोंगरास पोंचून यारीम ऊर्फ कसालोन डोंगराच्या उत्तर बाजूस जाऊन बेथ-शेमेश येथें उतरते व तशीच तिम्नाकडे निघते; ११ तेथून ती सीमा एक्रोनच्या उत्तर भागावरून शिक्रोनापर्यंत गेली आहे आणि बाला पहाडावरून यबनेलास निघाली आहे; या सीमेचा शेवट ससुद्रतीरीं होतो. १२ पश्चिमेची सरहद्द महासमुद्राचा किनारा होय. यहूदा वंशास त्यांच्या कुळांप्रमाणें जो विभाग मिळाला त्याच्या ह्या चतुःसीमा होत.

१३ यफुन्नेचा पुत्र कालेब यास परमेश्वराच्या सांगण्याप्रमाणें यहोशवानें यहूदाच्या वंशजांबरोबर वतन दिलें तें अर्थात् किर्याथ-आर्बा ऊर्फ हेब्रोन होय; हा आर्बा अनाकाचा पिता. १४ कालेबानें शेशय, अहीमान व तलमय या अनाकाच्या तिन्ही पुत्रांस तेथून घालवून दिलें. १५ तेथून त्यानें दबीराच्या रहिवाश्यांवर हल्ला केला; दबीरचें पूर्वीचें नांव किर्याथ-सेफर होतें. १६ कालेब म्हणाला, जो कोणी किर्याथ-सेफर लढून काबीज करील त्याला मी आपली कन्या अखसा ही देईन. १७ त्यावरून कालेबाचा भाऊ कनाज याचा पुत्र अथनिएल यानें तें नगर घेतलें; तेव्हां कालेबानें आपली कन्या अखसा ही त्यास बायको करून दिली. १८ ती आली तेव्हां आपल्या पित्यापासून कांहीं जमीन मागून घेण्याची भर तिनें त्याला दिली; ती गाढवावरून उतरली तेव्हां कालेबानें तिला विचारिलें, तुला काय पाहिजे? १९ ती म्हणाली, मला एक देणगी दे; तूं मला दक्षिणेकडची जमीन दिली आहेच; मला पाण्याचे झरेहि दे; तेव्हां त्यानें वरचे आणि खालचे झरे तिला दिले.

२० यहूदा वंशाच्या कुळांप्रमाणें जो त्यांचा वतन-भाग ठरला तो हा:

२१ यहूदाच्या वंशजांना दक्षिणेस अदोमाच्या सीमेजवळील नगरें मिळालीं तीं हीं: कब्सेल, एदेर व यागूर; २२ कीना, दीमोना व अदादा; २३ केदेश, हासोर व इथनान; २४ जीफ, टेलेम व बालोथ; २५ हासोर-हदत्ता व करीयोथ-हस्रोन (हेंच हासोर); २६ अमाम, शमा व मोलादा; २७ हसर-गदा, हेष्मोन व बेथ-पेलेट; २८ हसर-शुवाल, बैर-शेबा व बिजोथा; २९ बाला, ईयीम, व असेम; ३० एल्तोलाद, कसील व हर्मा; ३१ सिकलाग, मद्मन्ना व सन्सन्ना; ३२ लबावोथ, शिल्हीम, अईन व रिम्मोन; हीं सर्व नगरें मिळून एकुणतीस व त्यांचे गांव.

३३ तळवटींतलीं नगरें हीं: एष्टावोल, सरा व अष्णा; ३४ जानोह, एन-गन्नीम, तप्पूहा व एनाम; ३५ यर्मूथ, अदुल्लाम, सोखो व अजेका; ३६ शारईम, अदीथईम, गदेरा व गदेरोथईम; अशीं चौदा नगरें व त्यांचे गांव.

३७ सनान, व हदाशा व मिग्दल-गाद; ३८ दिलान, मिस्पा व यकथेल; ३९ लाखीश, बसकाथ, व एग्लोन; ४० कब्बोन, लहमाम व किथलीश; ४१ गदेरोथ, बेथ-दागोन, नामा व मक्केदा अशीं सोळा नगरें व त्यांचे गांव.

४२ लिब्ना, एथेर व आशान; ४३ इफ्ताह, अष्णा व नसीब; ४४ कईला, अकजीब व मारेशा; अशीं नऊ नगरें व त्यांचे गांव.

४५ एक्रोन व त्याचीं खेडींपाडीं; ४६ एक्रोना-जवळचीं व पश्चिमेचीं अश्दोदाच्या बाजूकडलीं सर्व नगरें व त्यांचे गांव.

४७ अश्दोद व त्यांचीं खेडींपाडीं; गज्जा व त्यांचीं खेडीं-पाडीं; मिसराचा नाला व महासमुद्राच्या तीरचीं नगरें.

४८ आणि डोंगरवटींतलीं नगरें हीं: शामीर, यत्तीर व सोखो; ४९ दन्ना, किर्याथ-सन्ना ऊर्फ दबीर; ५० अनाब, एष्टमो व अनीम; ५१ गोशेन, होलोन, व गिलो, अशीं अकरा नगरें व त्यांचे गांव.

५२ अराब, दूमा व एशान; ५३ यानीम, बेथ-तप्पूहा व अफेका; ५४ हुमटा, किर्याथ-अर्बा ऊर्फ हेब्रोन व सियोर; अशीं नऊ नगरें व त्यांचे गांव.

५५ मावोन, कर्मेल, जीफ व यूटा; ५६ इस्रेल,
यकदाम व जानोह; ५७ काइन, गिबा व तिम्ना; अशीं
दहा नगरें व त्यांचे गांव.
५८ हल्हूल, बेथ-सूर, गदोर; ५९ माराथ, बेथ-
अनोथ व एल्तकोन; अशीं सहा नगरें व त्यांचे गांव.
६० किर्याथ-बाल म्हणजे किर्याथ-यारीम व राब्बा
हीं दोन नगरें व त्यांचे गांव.
६१ रानांतलीं नगरें हीं: बेथ-अराबा, मिद्दीन व
सखाखा; ६२ निबशान, क्षारनगर व एन-गेदी; अशीं
सहा नगरें व त्यांचे गांव.
६३ यरुशलेमांत राहणाऱ्या यबूशी लोकांस यहूदाच्या
वंशजांना घालवून देतां आलें नाहीं; आणि आजपर्यंत
यबूशी लोक यरुशलेमांत यहूदाच्या वंशजांबरोबर
राहत आहेत.

१६ १ योसेफाच्या वंशजांचा जो भाग चिठ्या
टाकून ठरविला तो हा: त्याची सीमा यरीहो-
जवळ यार्देन नदीपासून पूर्वेकडून यरीहोच्या
जलसंचयापाशीं जाऊन रानांतील पहाडी प्रदेशांतून
बेथेलास निघते; २ तेथून ती लूज येथें जाऊन
अर्कीच्या सीमेवरून अटारोथ येथें निघते; ३ पश्चिमे-
कडे यफलेटी यांच्या सरहद्दीवरून खालचें
बेथ-होरोन व गेजेर येथवर उतरून समुद्रमर्यादेस
पोहंचते. ४ योसेफाचे पुत्र मनश्शे व एफ्राईम यांनीं
आपलें वतन घेतलें. ५ एफ्राईम वंशजांची सरहद्द
त्यांच्या त्यांच्या कुळांप्रमाणें ठरली ती ही: त्यांच्या
वतनाच्या सरहद्दीस पूर्वेस आरंभ होऊन अटारोथ
अद्दार येथून वरल्या बेथ-होरोनास पोहंचते; ६ उत्तर
सीमा पश्चिमेकडील मिखमथाथ येथें सुरू होऊन पूर्वेस
वळसा घेऊन तानथ-शिलो येथें पोहंचते व तेथून पुढें
निघून पूर्वेस यानोहा येथवर जाते; ७ यानोहा येथून
ती अटारोथ व नारा येथें उतरून यरीहोपाशीं यार्देने-
वर निघते. ८ ही सीमा तप्पूहा येथून निघून पश्चिम
दिशेस जाऊन काना ओहळावरून समुद्रापाशीं निघते;
एफ्राइमाच्या वंशजाचें त्यांच्या कुळांप्रमाणें वतन हें होय;
९ तसेंच मनश्शाच्या वंशजांच्या वतनापैकीं नगरें आस-
पासच्या खेड्यांपाड्यांसह एफ्राइमाच्या वंशजांसाठीं
वेगळीं करून ठेवण्यांत आलीं. १० गेजेरांत जे कनानी लोक
राहत होते त्यांस एफ्राइम्यांनीं घालवून दिलें नाहीं म्हणून
ते कनानी त्यांच्यामध्यें आजपर्यंत वस्ती करून आहेत;
ते दास होऊन बिगारकाम करणारे झाले.

१७ १ योसेफाचा ज्येष्ठ पुत्र मनश्शे याच्या
वंशाचा भाग चिठ्या टाकून ठरविला तो हा:
माखीर हा ज्येष्ठ पुत्र गिलादाचा पिता होता,
हा मोठा योद्धा होता म्हणून त्यास गिलाद व बाशान
हे प्रांत मिळाले. २ मनश्शाच्या बाकीच्या वंशजांस
त्यांच्या कुळांप्रमाणें जे विभाग मिळाले ते असे: अबि-
येजेर, हेलेक, अस्रियेल, शेखेम, हेफेर व शमीदा हे
आपआपल्या कुळांप्रमाणें योसेफपुत्र मनश्शे याच्या
वंशांतले पुरुष होते, त्यांच्या निरनिराळ्या कुळांसाठीं
हे विभाग ठरले; ३ पण सलाफहाद बिन हेफेर बिन
गिला बिन माखीर बिन मनश्शे यास पुत्रसंतान
नव्हतें, कन्या होत्या; त्या कन्यांचीं नांवें महला,
नोआ, हाग्ला, मिल्का व तिरसा हीं होतीं. ४ एलाजार
याजक, नूनाचा पुत्र यहोशवा आणि सरदार मंडळी
यांच्यापुढें ह्या कन्या येऊन म्हणाल्या, परमेश्वरानें
मोशाला आज्ञा दिली होती तीप्रमाणें आम्हांस आमच्या
भाऊबंदांमध्यें वतन द्या; तेव्हां यहोशवानें परमेश्वराच्या
आज्ञेप्रमाणें त्यांस त्यांच्या बापाच्या भाऊबंदांबरोबर वतन
दिलें. ५ या प्रकारें यार्देनेपलीकडे गिलाद व बाशान या
प्रांतांखेरीज मनश्शाला दहा विभाग मिळाले; ६ कारण
मनश्शाच्या वंशांतल्या स्त्रियांस त्यांच्या पुत्रसंतती-
बरोबर वतनभाग मिळाला आणि मनश्शाच्या वंशाच्या
इतर लोकांस गिलाद प्रांत मिळाला. ७ मनश्शाची सीमा
आशेराहून शखेमासमोरल्या मिखमथाथपर्यंत जाते;
व पुढें ती उजव्या बाजूस एन-तप्पुहाच्या लोकवस्ती-
पर्यंत जाऊन पोहंचते. ८ तप्पुहाचा प्रांत मनश्शाचा
होता; पण मनश्शाच्या सीमेवरील तप्पूहा नगर हें
एफ्राइमाचें होतें. ९ तेथून ती सीमा काना ओहळापर्यंत
उतरून त्याच्या दक्षिणेस पोहंचते; तेथील मनश्शाच्या
प्रांतांतील कांहीं नगरें एफ्राइमाचीं होतीं; आणखी

मनश्शाची सीमा त्या ओहळाच्या उत्तरेस जाऊन
समुद्रापर्यंत निघते. १० दक्षिणेकडील प्रदेश एफ्राइमाचा
व उत्तरेकडला मनश्शाचा, त्याची सीमा समुद्र होय;
त्याच्या उत्तर सीमेस आशेर व पूर्वेस इस्साखार आहे.
११ इस्साखार व आशेर यांच्या प्रांतांत मनश्शाचे
गांव होते ते हे: बेथ-शान व त्याचीं खेडींपाडीं,
इब्लाम व त्याचीं खेडींपाडीं, दोर येथील लोकवस्ती
व त्याचीं खेडींपाडीं; एन-दोरची लोकवस्ती व त्याचीं
खेडींपाडीं, तानख येथील लोकवस्ती व त्याचीं खेडीं-
पाडीं, मगिद्दो व त्याचीं खेडींपाडीं आणि त्यांच्या
रहिवाश्यांसह तीन टेकड्या; १२ पण या नग-
राच्या रहिवाश्यांस मनश्शाच्या वंशजांना घालवून
देतां येईना; त्या देशांतच राहण्याचा कनान्यांनीं हट्ट
धरिला. १३ इस्राएल लोक समर्थ झाले तेव्हां त्यांनीं
त्या कनानी लोकांस बिगारकाम करावयास लाविलें,
सगळ्यांना हाकून लाविलें नाहीं.

१४ योसेफाचे वंशज यहोशवास म्हणाले, परमे-
श्वराचा आम्हांवर आजवर प्रसाद असल्यामुळें आम्ही
संख्येनें बहुत आहोत तर तूं चिठी टाकून आम्हांस
वतनाचा एकच विभाग कां दिला? १५ यहोशवा त्यांस
म्हणाला, तुम्ही संख्येनें बहुत आहां व एफ्राइमाचा
डोंगराळ प्रदेश तुम्हांस पुरत नाहीं तर परिज्जी व
रेफाई यांच्या देशांतलें रान तोडून तेथें वस्ती करा.
१६ तेव्हां योसेफाचे वंशज म्हणाले, हा डोंगराळ
प्रदेश आम्हांस पुरत नाहीं; बेथ-शान व त्याच्या आस-
पासचीं खेडींपाडीं आणि इज्रेल खोरें, या तळप्रांतांतल्या
राहणाऱ्या कनानी लोकांपाशीं लोखंडी रथ आहेत.
१७ यहोशवानें योसेफाच्या वंशजांस म्हणजे एफ्राईम
व मनश्शे यांस सांगितलें, तुम्ही संख्येनें बहुत आहां
व तुमचें सामर्थ्यहि मोठें आहे; तुम्हांस केवळ एकच
विभाग मिळावयाचा असें नाहीं, १८ तर तो पहाडी
देशहि तुमचा होईल; तेथें अरण्य आहे तें तोडा
म्हणजे त्याच्या आसपासचा देश तुमचा होईल.
कनानी लोकांपाशीं लोखंडी रथ असले व ते बलिष्ठ
असले तरी तुम्हांस त्यांना घालवून देतां येईल.

१ मग इस्राएलांची सर्व मंडळी शिलो येथें
१८ एकत्र झाली व तेथें त्यांनीं दर्शनमंडप उभा
केला; आतां सर्व देश त्यांच्या हातीं आला
होता. २ इस्राएल लोकांपैकीं ज्यांस वतनभाग मिळाला
नव्हता असे अद्यापि सात वंश राहिले होते. ३ यहोशवा
इस्राएल लोकांस म्हणाला, तुमच्या पूर्वजांचा देव परमे-
श्वर यानें तुम्हांस जो देश दिला तो आपल्या ताब्यांत
घेण्याविषयीं तुम्ही कोठवर दिरंगाई करणार? ४ प्रत्येक
वंशांतील तीन पुरुष नेमा म्हणजे मी त्यांस पाठवितों;
त्यांनीं जाऊन चोहोंकडे फिरून देश पाहावा, आणि
आपआपल्या वंशास मिळावयाच्या वतनभागांचें वर्णन
लिहून मजकडे आणावें. ५ त्यांनीं उरलेल्या देशाचे सात
भाग रेखावे; यहूदानें दक्षिणेकडील आपल्या नेमिलेल्या
वतनभागांत वस्ती करावी आणि योसेफाच्या वंशजांनीं
उत्तरेकडील आपल्या वतनभागांत वस्ती करावी.
६ त्या देशाचे सात भाग कल्पून तें वर्णन मजकडे आणावें
म्हणजे मी येथें आपला देव परमेश्वर याच्यासमोर
तुमच्या नांवांच्या चिठ्या टाकीन. ७ लेव्यांस तर तुमच्या-
मध्यें वतन नाहीं; परमेश्वरानें त्यांस दिलेली याजकवृत्ति
हीच त्यांचें वतन होय; गाद, रऊबेन व मनश्शाचा अर्धा
वंश यांस यार्देनेच्या पूर्वेस वतन मिळून चुकलें आहे;
परमेश्वराचा सेवक मोशे यानें त्यांस तें दिलें आहे.
८ मग ते पुरुष मार्गस्थ झाले; तेव्हां त्या देशाचें वर्णन
लिहावयास जे जाणार होते त्यांस यहोशवानें आज्ञा दिली
कीं जा आणि देशांत इकडेतिकडे फिरा आणि त्याचें वर्णन
लिहून मजकडे आणा म्हणजे मी शिलो येथें परमेश्वरा-
समोर तुमच्या नांवांच्या चिठ्या टाकीन. ९ तेव्हां ते पुरुष
तेथून निघून देशभर फिरले व त्यांतील नगरांप्रमाणें
त्याच्या सात वांट्यांचें वर्णन त्यांनीं वहींत लिहून तें सर्व
शिलो येथील छावणींत यहोशवाकडे आणिलें. १० शिलो
येथें परमेश्वरासमोर यहोशवानें त्यांच्या नांवांच्या चिठ्या
टाकिल्या; त्या ठिकाणीं यहोशवानें इस्राएल लोकांस
त्यांच्या त्यांच्या वतनभागांप्रमाणें जमीन वांटून दिली.

११ बन्यामिनाच्या वंशजांस त्यांच्या कुळांप्रमाणें
चिठी टाकून जो वांटा मिळाला तो असा: त्याचा

वांटा यहूदाचे वंशज आणि योसेफाचे वंशज यांच्या प्रांतांच्या दरम्यान होता. १२ त्यांची उत्तर सीमा यार्देनेनजीक सुरू होऊन यरीहोच्या उत्तरेकडून वर जाऊन पश्चिमेस डोंगरावरून बेथ-आवेनच्या रानांत निघते; १३ तेथून ती लूज ऊर्फ बेथेल येथें पोहंचते आणि लूजच्या दक्षिण बाजूकडून निघून खालच्या बेथ-होरोनाच्या दक्षिणेकडल्या पहाडापासून अटरोथ-अद्दार येथें निघते. १४ तेथून मग पश्चिम सीमा वळसा घेऊन बेथ-होरोनाच्या समोरून त्याच्या दक्षिणेकडील पहाडावरून यहूदाचें नगर किर्याथ-बाल ऊर्फ किर्याथ-यारीम येथें निघते; याची पश्चिम सीमा हीच. १५ दक्षिणेकडील सीमा पश्चिमेस सुरू होऊन किर्याथ-यारिमाच्या वरच्या टोकापासून निघून नफ्तोह झऱ्याकडे जाते; १६ तेथून हिन्नोमपुत्राच्या खिंडीसमोरील व रेफाई खिंडीच्या उत्तरेस असलेल्या पहाडांच्या उत्तर टोकापासून हिन्नोम खिंडींत म्हणजे यबूशीच्या दक्षिण बाजूनें ती सीमा एन-रोगेल येथें उतरते; १७ तेथून ती सीमा उत्तरेकडे वळसा घेऊन एन-शेमेश येथें निघते आणि तशीच अदुम्मीम चढावासमोर असलेल्या गलीलोथाकडे जाते; तेथून ती रऊबेनपुत्र बोहन याच्या खडकाकडे जाते; १८ मग ती उत्तरेकडे जाऊन मैदानासमोरून अराबांत उतरते. १९ तेथून ती सीमा बेथ-हाग्लाच्या उत्तर दिशेस जाऊन क्षारसमुद्राच्या उत्तरेच्या खाडीपाशीं यार्देनेच्या दक्षिण मुखापाशीं निघते; ही दक्षिणसीमा होय. २० त्याची पूर्वसीमा यार्देन होय. बन्यामिनाचा वतनभाग त्याच्या चतुःसीमांसहित त्यांच्या कुळांप्रमाणें हा होय. २१ बन्यामीन वंशाच्या लोकांस त्यांच्या त्यांच्या कुळांप्रमाणें हीं नगरें मिळालीं : यरीहो, बेथ-हाग्ला, एमेक-केसीस, २२ बेथ-अराबा, समाराईम, बेथेल, २३ अव्वीम, पारा, अफ्रा, २४ कफर-अम्मोनी, अफनी, आणि गेबा; हीं बारा नगरें व त्यांच्या आसपासचे गांव; २५ गिबोन, रामा व बैरोथ; २६ मिस्पा, कफीरा व मोजा; २७ रेकेम, इर्पैल व तरला; २८ सेला, एलेफ, यबूशी ऊर्फ यरुशलेम, गिबाथ व किर्याथ; हीं चवदा नगरें व त्यांच्या आसपासचे गांव; बन्यामिनाच्या वंशजांचें त्यांच्या त्यांच्या कुळांप्रमाणें हें वतन होय.

१९ १ दुसरी चिठी शिमोनाच्या नांवाची म्हणजे शिमोनी वंशाची त्याच्या कुळाप्रमाणें निघाली; यहूदाच्या वंशजांच्या वतनामध्यें त्यांना वतन मिळालें. २ त्यांस हीं नगरें वतन मिळालीं : बैर-शेबा किंवा शेबा व मोलादा; ३ हसर-शुवाल, बाला व असेम; ४ एल्तोलद, बथूल व हर्मा, ५ सिकलाग, बेथ-मर्काबोथ व हसर सूसा; ६ बेथ-लबवोथ आणि शारूहेन हीं तेरा नगरें व त्यांच्या आसपासचे गांव; ७ अईन, रिम्मोन, एतेर व आशान; हीं चार नगरें व त्यांच्या आसपासचे गांव; ८ आणि बालथ-बैर, ज्यास दक्षिण देशचा रामा म्हणतात तेथपर्यंत या नगरांच्या सभोवतालचे सगळे गांव त्यांस मिळाले; शिमोनी वंशजांचा त्यांच्या कुळांप्रमाणें हाच वतनभाग होय. ९ शिमोनाला यहूदी वंशजांच्या वतनभागांतच वांटा देण्यांत आला. कारण यहूदी वंशाचें वतन त्यांच्या संख्येच्या मानानें फार मोठें होतें, म्हणून त्यांच्या वतनांत शिमोनी वंशजांस वतन मिळालें.

१० तिसरी चिठी जबुलून वंशजांची त्यांच्या कुळांप्रमाणें निघाली; त्यांच्या वतनाची सीमा सारीदपर्यंत आहे; ११ त्यांची सीमा पश्चिमेस मरलापयत जाऊन दब्बेशेथ येथें पोहंचते आणि यकनामासमोरील ओहळास जाऊन लागते; १२ ती सारीद येथून पूर्वेकडे उगवतीस वळून किसलोथ-ताबोर याच्या सीमेस लागते; तेथून दाबरथ येथें जाऊन याफीयपर्यंत वर जाते; १३ तेथून पूर्व दिशेकडे गथ-हेफेर व इत्ता-कासीन येथवर जाते; आणि तेथून नेयाजवळील रिम्मोन येथें निघते; १४ तेथून ती सीमा त्याला वळसा घालून उत्तरेस हन्नाथोनपर्यंत जाते व तेथून इफता-एल खोऱ्यांत संपते; १५ कट्टाथ, नहलाल, शिम्रोन, इदला, बेथलहेम आदिकरून बारा नगरें व त्यांचे आसपासचे गांव त्यांस दिले. १६ जबुलून वंशांतील लोकांचीं त्यांच्या कुळांप्रमाणें नगरें व त्यांच्या आसपासचे गाव हे होत.

१७ इस्साखाराच्या वंशजांची त्यांच्या कुळांप्रमाणें
चौथी चिठी निघाली. १८ त्यांच्या सीमेच्या आंत हीं
नगरें होतीं; इज्रेल, कसुल्लोथ व शूनेम; १९ हफाराईम,
शियोन व अनाहराथ; २० रब्बीथ, किशोन व अबेस;
२१ रेमेथ, एन-गन्नीम, एन-हद्दा व बेथ-पसेस;
२२ त्याची सीमा ताबोर, शहसुमा व बेथ-शेमेश
येथवर जाते आणि ती यार्देनेपाशीं संपते; त्यांस हीं
सोळा नगरें आणि त्यांच्या आसपासचे गांव मिळाले.
२३ इस्साखाराच्या वंशजांचीं त्यांच्या कुळांप्रमाणें
नगरें व त्यांच्या आसपासचे गांव हे होत.

२४ पांचवी चिठी आशेर वंशजांच्या नांवाची
त्यांच्या कुळांप्रमाणें निघाली. २५ त्यांच्या सीमेच्या
आंत हीं नगरें होतीं: हेल्कथ, हली, बटेन, व
अक्षाफ; २६ अल्लामेलेख, अमाद, व मिशाल; त्यांची
सीमा पश्चिमेस कर्मेल व शिहोर-लिब्नाथ एथवर
जाते; २७ ती वळून उगवतीस बेथ-दागोन येथवर
जाऊन उत्तरेस जबुलूनच्या वतनभागापर्यंत आणि
इफताह-एल खोऱ्याच्या उत्तरेकडून बेथ-एमेक व नियेल
येथपर्यंत पोहंचते, व तशीच ती डावीकडे काबूल येथें
निघते; २८ तेथून ती एब्रोन, रहोब, हम्मोन व काना
यांवरून जाऊन मोठ्या सीदोनापर्यंत पोहंचते; २९ तेथून
ती वळसा घेऊन रामापर्यंत जाते व तेथून सोर नामक
तटबंदीच्या नगरापर्यंत जाते; तेथून ती होसाकडे वळते
आणि अकजीब प्रदेशांतून जाऊन समुद्रास मिळते;
३० उम्मा, अफेक व रहोब हींहि त्यांच्या वांट्यास
आलीं; एकंदर बावीस नगरें व त्यांच्या आसपासचे गांव
त्यांस मिळाले; ३१ आशेरच्या वंशजांची त्यांच्या कुळां-
प्रमाणें नगरें व त्यांच्या आसपासचे गांव हे होत.

३२ सहावी चिठी नफताली वंशजांच्या नांवाची
त्यांच्या कुळांप्रमाणें निघाली. ३३ त्यांची सीमा हेलेफ
आणि साननीमांतील एला वृक्ष यांपासून अदामी नेकेब व
यबनेल यांवरून लक्कुम येथें जाऊन यार्देनेपाशीं निघते;
३४ तेथून ती पश्चिमेस वळून अजनोथ-ताबोर येथें जाते
व तेथून हुक्कोक येथें जाते व तेथून दक्षिणेस जबुलूनाच्या
वतनभागापर्यंत आणि पश्चिमेस आशेरच्या वतनभागा-
पर्यंत उगवतीस यार्देनेपाशीं यहूदाच्या वतनभागाला
जाऊन पोहंचते. ३५ त्यांतील तटबंदीचीं नगरें हीं:
सिद्दीम, सेर, हम्मथ, रक्कथ व किन्नेरेथ; ३६ अदामा, राम;
व हासोर; ३७ केदेश, एद्रई व एन-हासोर; ३८ इरोन,
मिग्दल-एल, होरेम, बेथ-अनाथ व बेथ-शेमेश हीं एको-
णीस नगरें व त्यांचे गांव. ३९ नफतालीच्या वंशजांचीं
त्यांच्या कुळांप्रमाणें नगरें व आसपासचे गांव हे होत.

४० सातवी चिठी दान वंशजांच्या नांवाची
त्यांच्या कुळांप्रमाणें निघाली. ४१ त्यांच्या वतन-
सीमेच्या आंतील हीं नगरें होतीं: सरा, एष्टावोल व
ईर-शमेश; ४२ शालब्बीन, अयालोन व इथला;
४३ एलोन, तिम्ना व एक्रोन; ४४ एल्तके, गिब्बथोन
व बालाथ; ४५ यहूद, बने-बराक व गथ-रिम्मोन;
४६ मीयर्कोन, रक्कोन आणि याफोच्या समोरील प्रदेश.
४७ दान वंशजांची सीमा त्यांच्या मूळ वतनाच्या बाहेर
गेली; कारण दान वंशजांनीं लेशेमावर स्वारी करून
तें लढून घेतलें, तरवारीनें त्याचा विध्वंस केला आणि
त्यांचा ताबा घेऊन तेथें वस्ती केली; आणि आपला
मूळपुरुष दान याचें नांव त्यांनीं लेशेमास ठेविलें.
४८ दानाच्या वंशजांस त्यांच्या कुळांप्रमाणें जीं नगरें
व आसपासचे गांव मिळाले ते हे.

४९ चतुःसीमांप्रमाणें वतनें वांटून देण्याचें
संपविल्यावर इस्राएल लोकांनीं नूनाचा पुत्र यहोशवा
यास आपल्यांतून हिस्सा दिला; ५० त्यानें मागितलेलें
एफ्राइमाच्या डोंगराळ देशांतील तिम्नाथ-सेरह नामक
नगर परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें त्यास दिलें; तें नगर
वसवून त्यांत तो राहूं लागला.

५१ एलाजार याजक, नूनाचा पुत्र यहोशवा आणि
इस्राएल वंशांचे त्यांच्या पितृकुळांप्रमाणें प्रमुख यांनीं
शिलो येथें दर्शनमंडपाच्या द्वारीं परमेश्वरासमोर चिठ्या
टाकून जीं वतनें वांटून दिलीं तीं हीं. याप्रमाणें देश
वांटून देण्याचें संपलें.

२० १ मग परमेश्वर यहोशवास म्हणाला,
२ इस्राएल लोकांस सांग, मीं मोशाच्या द्वारें
तुम्हांस सांगितलें होतें कीं शरणपुरें ठरवा;

३ म्हणजे कोणीं भुलचुकीनें कोणाचा जीव घेतला
असला त्यांत त्याला पळून जातां येईल व खुनाचा सूड
उगविणाऱ्यापासून तुम्हांस तीं रक्षणस्थानें अशीं होतील.
४ असा मनुष्य अशा एका नगराकडे पळून गेला म्हणजे
त्यानें नगराच्या वेशीपाशीं उभें राहावें आणि त्यांतील
वडील मंडळीस आपलें प्रकरण सांगावें, मग त्यांनीं
त्याला आपल्या नगरांत घेऊन आपल्यामध्यें राहा-
वयास जागा द्यावी. ५ खुनाचा सूड घेणाऱ्यानें त्याचा
पाठलाग केला तर त्या वडील जनांनीं त्या मनुष्यवध
करणाऱ्यास त्याच्या हातीं देऊं नये; कारण त्यानें
नकळत आपल्या शेजाऱ्यास जिवें मारिलें; त्याचें
त्याजशीं पूर्वीचें वैर नव्हतें. ६ मंडळीसमोर त्याचा
न्याय होईपर्यंत अथवा त्या वेळचा मुख्य याजक हयात
असेल तोंपर्यंत त्यानें त्या नगरांत राहावें; मग पाहिजे
तर ज्या गांवाहून तो पळाला होता तेथें त्यानें परत
जाऊन आपल्या घरीं राहावें. ७ यावरून त्यांनीं नफ-
तालीच्या डोंगराळ प्रदेशांतील गालीलांतलें केदेश,
एफ्राइमाच्या डोंगरवटींतलें शखेम, यहूदाच्या डोंगराळ
प्रदेशांतलें किर्याथ-आर्बा ऊर्फ हेब्रोन हीं नगरें वेगळीं
नेमून ठेविलीं. ८ यरीहोच्या पूर्वेस यार्देनेपलीकडे
त्यांनीं रऊबेन वंशाच्या विभागापैकीं माळावरल्या
रानांतलें बेसेर, गाद वंशाच्या विभागापैकीं गिलादांतील
रामोथ आणि मनश्शे वंशाच्या विभागापैकीं बाशानांतलें
गोलान हीं नगरें ठेविलीं. ९ सर्व इस्राएल लोकांसाठीं
व त्यांच्यामध्यें वस्ती करणाऱ्या परदेशी लोकांसाठीं
हीं नेमलेलीं नगरें होतीं; तीं अशासाठीं कीं कोणी
कोणास भुलचुकीनें मारिलें व तो अशा एका नगरांत
पळून गेला तर मंडळीसमोर उभे राहून त्याचा न्याय
झाल्याशिवाय खुनाचा सूड घेणाऱ्यास त्यास जिवें
मारितां येऊं नये.

२१ १ मग लेवी वंशांतील पितृकुळांचे प्रमुख
पुरुष हे एलाजार याजक, नूनाचा पुत्र यहोशवा
व इस्राएली वंशांच्या पितृकुळांचे प्रमुख
यांच्यापाशीं आले; २ ते कनान देशांतील शिलो येथें
येऊन म्हणाले कीं परमेश्वरानें मोशाच्या द्वारें अशी
आज्ञा केली होती कीं आमच्या वस्तीसाठीं नगरें आणि
आमच्या जनावरांसाठीं शिवारें द्यावीं. ३ त्यावरून
इस्राएल लोकांनीं परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें आपआपल्या
वतनभागांपैकीं लेव्यांस नगरें व शिवारें दिलीं, तीं
येणेंप्रमाणें:

४ कहाथी कुळाची चिठी निघाली तेव्हां लेव्यांपैकीं
अहरोन याजकाच्या वंशजांस यहूदा, शिमोन व
बन्यामीन या वंशांच्या वांट्यांतून तेरा नगरें मिळालीं.

५ बाकीच्या कहाथी वंशजांस एफ्राईम वंशांतील
कुळांच्या वांट्यांतून आणि दान वंशाच्या व मनश्शाच्या
अर्ध्या वंशाच्या नगरांपैकीं दहा नगरें चिठ्या टाकून दिलीं.

६ गेर्षोन वंशजांस इस्साखार वंशांतील कुळांच्या
आणि आशेर व नफताली यांच्या वंशाच्या आणि
बाशानांतल्या मनश्शाच्या अर्ध्या वंशाच्या नगरां-
पैकीं तेरा नगरें चिठ्या टाकून दिलीं.

७ मरारी वंशजांस त्यांच्या कुळांप्रमाणें रऊबेन व
जबुलून यांच्या वंशांच्या वांट्यांपैकीं बारा नगरें दिलीं.

८ परमेश्वरानें मोशाला दिलेल्या आज्ञेप्रमाणें इस्राएल
लोकांनीं लेव्यांस चिठ्या टाकून हीं नगरें व त्यांचीं
शिवारें दिलीं. ९ त्यांनीं यहूदा व शिमोन यांच्या
कुळांच्या विभागांतलीं पुढें सांगितलेलीं नगरें दिलीं,
१० लेवी वंशांतील कहाथी कुळांतल्या अहरोनाच्या
वंशजांस प्रथम वांटा मिळाला. ११ त्यांस त्यांनीं यहूदां-
तील डोंगराळ प्रदेशांतलें किर्याथ-आर्बा ऊर्फ हेब्रोन हें नगर
शिवारांसहित दिलें; आर्बा हा अनाकाचा पिता होता;
१२ पण त्या नगरचीं शेती आणि आसपासचीं खेडींपाडीं
यफुन्नेचा पुत्र कालेब यास त्यांनीं वतन करून दिलीं होतीं.

१३ अहरोन याजकाच्या वंशजांस मनुष्यवध
करणाऱ्यासाठीं शरणपूर म्हणून हेब्रोन व त्याचें शिवार,
याखेरीज लिब्ना व त्याचें शिवार; १४ यत्तीर व त्याचें
शिवार, एष्टमोवा व त्याचें शिवार; १५ होलोन व
त्याचें शिवार, दबीर व त्याचें शिवार; १६ अईन व
त्याचें शिवार, युट्टा व त्याचें शिवार, बेथ-शेमेश व
त्याचें शिवार अशीं एकंदर नऊ नगरें त्या दोन वंशांच्या
विभागांतून दिलीं. १७ बन्यामीन वंशाच्या विभागा-

पैकीं गिबोन व त्याचें शिवार, गेबा व त्याचें शिवार;
१८ अनाथोथ व त्याचें शिवार आणि अलमोन व
त्याचें शिवार अशीं चार नगरें दिलीं. १९ या प्रकारें
अहरोन वंशांतील याजकांस तेरा नगरें व त्यांचीं
शिवारें मिळालीं.

२० बाकीच्या कहाथी वंशांतील लेव्यांस एफाईम
वंशाच्या विभागापैकीं चिठी टाकून नगरें दिलीं.
२१ मनुष्यवध करणाऱ्यासाठीं शरणपूर म्हणून त्यांस
एफाइमाच्या डोंगराळ प्रदेशांतील शखेम नगर व त्याचें
शिवार, याखेरीज गेजेर व त्याचें शिवार; २२ किबसा-
ईम व त्याचें शिवार आणि बेथ-होरोन व त्याचें शिवार
अशीं एकंदर चार नगरें त्यांनीं दिलीं. २३ दान वंशाच्या
विभागाकरितां एल्तके व त्याचें शिवार, गिब्बथोन व
त्याचें शिवार, २४ अयालोन व त्याचें शिवार आणि
गथ-रिम्मोन व त्याचें शिवार हीं चार नगरें त्यांनीं दिलीं.
२५ मनश्शाच्या अर्ध्या वंशाच्या विभागापैकीं तानख व
गथ-रिम्मोन व त्यांचीं शिवारें हीं दोन नगरें दिलीं.
२६ या प्रकारें त्यांनीं बाकी राहिलेल्या कहाथी वंशजांस
एकंदर दहा नगरें शिवारांसह दिलीं.

२७ लेवी वंशांतील गेर्षोनाच्या कुळास मनश्शाच्या
अर्ध्या वंशाच्या विभागापैकीं मनुष्यवध करणाऱ्यासाठीं
शरणपूर म्हणून बाशानांतलें गोलान व त्याचें शिवार,
याखेरीज बैश्तरा व त्याचें शिवार अशीं एकंदर दोन
नगरें त्यांनीं दिलीं. २८ इस्साखार वंशाच्या विभागापैकीं
किश्शोन व त्याचें शिवार,दाबरथ व त्याचें शिवार; २९यर्मूथ
व त्याचें शिवार आणि एन-गन्नीम व त्याचें शिवार हीं चार
नगरें त्यांनीं दिलीं. ३० आशेर वंशाच्या विभागापैकीं मिशाल
व त्याचें शिवार, अब्दोन व त्याचें शिवार; ३१ हेल्काथ
व त्याचें शिवार आणि रहोब व त्याचें शिवार हीं चार
नगरें त्यांनीं दिलीं. ३२ नफताली वंशाच्या विभागापैकीं
गालीलांतलें नगर मनुष्यवध करणाऱ्यासाठीं शरणपूर
म्हणून केदेश व त्याचें शिवार, हम्मोथ-दोर व त्याचें
शिवार आणि कर्तान व त्याचें शिवार हीं तीन नगरें त्यांनीं
दिलीं. ३३ येणेंप्रमाणें त्यांनीं गेर्षोन वंशजांस त्यांच्या कुळां-
प्रमाणें एकंदर तेरा नगरें त्यांच्या शिवारांसहित दिलीं.

३४ बाकीच्या लेव्यांस म्हणजे मरारी वंशाच्या
लोकांस जबुलून वंशाच्या विभागापैकीं यकनाम व त्याचें
शिवार, कर्ता व त्याचें शिवार; ३५ दिम्रा व त्याचें
शिवार आणि नहलाल व त्याचें शिवार अशीं चार नगरें
त्यांनीं दिलीं. ३६ रऊबेन वंशाच्या विभागापैकीं बेसेर
व त्याचें शिवार, याहस व त्याचें शिवार, ३७ कदेमोथ
व त्याचें शिवार आणि मेफाथ व त्याचें शिवार अशीं
चार नगरें त्यांनीं दिलीं. ३८ मनुष्यवध करणाऱ्यासाठीं
शरणपूर म्हणून गाद वंशाच्या विभागापैकीं गिलादांतील
रामोथ व त्याचें शिवार, याखेरीज महनाइम व त्याचें
शिवार; ३९ हेशबोन व त्याचें शिवार आणि याजेर व त्याचें
शिवार अशीं एकंदर चार नगरें त्यांनीं दिलीं. ४० याप्रमाणें
बाकीच्या लेव्यांस म्हणजे मरारी वंशाच्या लोकांस त्यांच्या
कुळांप्रमाणें एकंदर बारा नगरें चिठ्या टाकून त्यांनीं दिलीं.

४१ इस्राएल लोकांच्या वतनांतून लेव्यांस एकंदर अठ्ठे-
चाळीस नगरें त्यांच्या शिवारांसहित त्यांनीं दिलीं, ४२ हीं
नगरें त्यांच्या आसपासच्या सर्व शिवारांसहित मिळालीं;
हा प्रकार त्या सर्व नगरांस लागू होता.

४३ या प्रकारें जो देश देण्याविषयीं परमेश्वरानें
इस्राएल लोकांच्या पूर्वजांशीं आणभाक केली होती तो
अवघा त्यानें त्यांस दिला व ते त्याचें वतन पावून त्यांत
राहूं लागले. ४४ परमेश्वरानें त्यांच्या पूर्वजांस वचन दिलें
होतें त्याप्रमाणें त्यास चोहोंकडून विसावा मिळाला;
त्यांच्या कोणाहि शत्रूंस त्यांच्यापुढें टिकाव धरवला
नाहीं; परमेश्वरानें त्यांचे सर्व शत्रु त्यांच्या हातीं दिले.
४५ परमेश्वरानें इस्राएल घराण्यास ज्या ज्या हिताच्या
गोष्टी सांगितल्या होत्या त्यांतली एकहि उणी पडली
नाहीं; त्या सर्व सिद्धीस गेल्या.

२२ १ मग यहोशवानें रऊबेन वंश, गादी वंश व
मनश्शाचा अर्धा वंश यांच्या लोकांना बोलावून
सांगितलें, २ परमेश्वराचा सेवक मोशे यानें
तुम्हांस जें कांहीं सांगितलें होतें त्याप्रमाणें तुम्हीं सर्व
कांहीं केलें आणि जी जी आज्ञा मीं तुम्हांस दिली ती
ती तुम्हीं ऐकली; ३ आजतागायत तुम्ही आपल्या
भाऊबंदांस सोडून गेला नाहीं आणि आपला देव पर-

मेश्वर यांची आज्ञा लक्षपूर्वक पाळिली. ४ आतां
तुमचा देव परमेश्वर यानें आपल्या वचनानुसार तुमच्या
भाऊबंदांस विसावा दिला आहे; तर आतां परमेश्वराचा
सेवक मोशे यानें यार्देनेपलीकडे तुम्हांस जी भूमि वतन
करून दिली आहे तेथें तुम्ही आपआपल्या डेऱ्यांस परत
जा. ५ मात्र परमेश्वराचा सेवक मोशे यानें तुम्हांस जें
धर्मशास्त्र व नियमशास्त्र लावून दिलें आहे तें पाळा;
आपला देव परमेश्वर याजवर प्रीति करा, त्याच्या सर्व
मार्गांनीं चाला, त्याच्या आज्ञा पाळा, त्याचे होऊन राहा
आणि त्याची सेवा जिवेंभावें करा; हें सर्व करण्याचें लक्षांत
बाळगा. ६ यहोशवानें त्यांस आशीर्वाद देऊन रवाना
केलें, आणि ते आपआपल्या डेऱ्यांकडे चालते झाले.
७ मनश्शाच्या अर्ध्या वंशास मोशानें बाशानांत विभाग
दिला होता, पण त्यांच्या दुसऱ्या अर्ध्या वंशास यहोशवानें
यार्देनेच्या पश्चिमेस त्यांच्या भाऊबंदांमध्यें विभाग
दिला होता. यहोशवानें त्यांस आपआपल्या डेऱ्यांकडे
रवाना केलें तेव्हां त्यानें त्यांस आशीर्वाद दिला व
म्हटलें, ८ विपुल पशु, रुपें, सोनें, पितळ, लोखंड, बहुत
वस्त्रें अशी संपत्ति घेऊन आपआपल्या डेऱ्यांस परत
जा; आपल्या शत्रूंपासून मिळविलेली लूट आपल्या
भाऊबंदांबरोबर वांटून घ्या.

९ मग रऊबेन वंश, गादी वंश, मनश्शाचा अर्धा वंश
यांचे लोक इस्राएल लोकांपासून कनान देशांतल्या
शिलोहून परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें मोशानें दिलेल्या
गिलाद नामक वतनभूमीस परत निघून गेले. १० जेव्हां
रऊबेन वंश, गाद वंश आणि मनश्शाचा अर्धा वंश
यांतले लोक कनान देशांतील यार्देन थडीच्या प्रदेशीं
आले तेव्हां त्यांनीं यार्देनेजवळ एक मोठी प्रेक्षणीय वेदी
बांधिली. ११ रऊबेन वंश, गाद वंश व मनश्शाचा अर्धा
वंश यांतल्या लोकांनीं कनान देशासमोर यार्देनेच्या
पैलथडीस इस्राएल लोकांच्या ताब्यांतल्या प्रदेशांत
एक वेदी बांधिल्याचें वर्तमान इस्राएल लोकांच्या
कानीं आलें. १२ इस्राएल लोकांच्या साऱ्या
मंडळीनें हें ऐकल्यावर त्यांजवर लढावयास चालून
जावें म्हणून ते सर्व शिलो येथें एकत्र जमले.

१३ मग इस्राएल लोकांनीं रऊबेन वंश, गाद वंश
व मनश्शाचा अर्धा वंश यांतल्या लोकांकडे गिलाद
देशीं एलाजार याजकाचा पुत्र फिनहास यास पाठविलें;
१४ आणि त्याजबरोबर इस्राएल लोकांच्या वंशांच्या
पितृकुळांतील प्रत्येक वंशामागें एक असे दहा
सरदार पाठविले; ते इस्राएल लोकांच्या कुळांतील
आपआपल्या पितृकुळांचे प्रमुख होते. १५ ते गिलाद
देशीं रऊबेन वंश, गाद वंश व मनश्शाचा अर्धा वंश
यांतील लोकांकडे जाऊन म्हणाले, १६ परमेश्वराची
सर्व मंडळी म्हणत आहे, तुम्हीं इस्राएलाचा देव
परमेश्वर याजविरुद्ध हें काय पातक केलें? तुम्हीं आतां
ही वेदी बांधिली आहे, यांत तुम्हीं परमेश्वराला
अनुसरावयाचें सोडून त्याजविरुद्ध आज बंडावा केला
आहे. १७ पाहा, पौराच्या प्रकरणीं जो आम्हांकडून
अधर्म घडला त्यामुळें परमेश्वराच्या मंडळीवर मरी
येऊन गेली, तरी आजवर आम्ही त्या अधर्मापासून
शुद्ध झालों नाहीं हें आम्हांस थोडें झालें आहे म्हणूनच
१८ तुम्ही आज परमेश्वराला अनुसरण्याचें सोडून
देत आहां काय? आज तुम्हीं परमेश्वराविरुद्ध बंडावा
केला तर उद्यां सर्व इस्राएल मंडळीवर त्याचा क्रोध
होईल. १९ तुमच्या वतनाची भूमि अपवित्र
असली तर परमेश्वराचा निवासमंडप जेथें आहे त्या
परमेश्वराच्या वतनदेशीं नदीपलीकडे येऊन आमच्या-
मध्यें वतन घ्या, पण आमचा देव परमेश्वर याच्या
वेदीखेरीज अन्य वेदी बांधून परमेश्वराविरुद्ध व
आम्हांविरुद्ध बंडावा करूं नका. २० जेरहाचा पुत्र
आखान यानें समर्पित वस्तूंसंबंधाच्या आज्ञेचा भंग
केला तेव्हां इस्राएलांच्या सर्व मंडळीवर कोप झाला
नाहीं काय? त्याच्या अधर्मानें त्याचा एकट्याचाच
नाश झाला नाहीं.

२१ तेव्हां रऊबेन वंश, गाद वंश व मनश्शाचा अर्धा
वंश यांतले लोक इस्राएली पितृकुळांच्या प्रमुखांस
म्हणाले, २२ देवाधिदेव परमेश्वर, देवाधिदेव परमेश्वर
याला ठाऊक आहे; इस्राएल लोकांसहि ठाऊक होवो
कीं आम्हीं परमेश्वराविरुद्ध बंड करून व त्याच्या आज्ञेचें

उल्लंघन करून असें केलें असल्यास तो आज आम्हांस
जीवंत न ठेवो. २३ परमेश्वराला अनुसरण्याचें सोडून
देण्यासाठीं आम्हीं ही वेदी बांधिली असली, तिजवर
होमार्पणें, पेयार्पणें आणि शांत्यर्पणें करण्यासाठीं
बांधिली असली, तर परमेश्वर आमची झडती घेवो.
२४ आम्हीं पुढला विचार करून व विशेष हेतूनें हें
केलें आहे; आम्ही म्हणालों, यदाकदाचित् पुढील
काळीं तुमचीं मुलें आमच्या मुलांस म्हणावयाचीं
कीं इस्राएलाचा देव परमेश्वर याजशीं तुमचा काय
संबंध आहे? २५ हे रऊबेनी व गादी लोकहो, पर-
मेश्वरानें तुमच्याआमच्यामध्यें यार्देनेची सीमा लावून
दिली आहे, म्हणून परमेश्वरावर तुमचा कांहीं हक्क नाहीं;
असें म्हणून तुमचे वंशज आमच्या वंशजांस परमेश्वराची
भक्ति सोडून द्यावयास लावतील. २६ यास्तव आम्हीं
म्हटलें कीं चला, आपण एक वेदी बांधूं; ती होमबलि
अथवा यज्ञबलि अर्पावयासाठीं नव्हे. २७ तर ती तुमच्या-
आमच्यामध्यें व आमच्यामागून आमच्या व तुमच्या
पिढ्यांमध्यें साक्ष व्हावी, यासाठीं कीं आपण होमबलि,
यज्ञबलि व शांत्यर्पणें यांहींकरून परमेश्वरासमोर
उपासना करावी, म्हणजे परमेश्वरावर तुमचा कांहीं हक्क
नाहीं असें पुढील काळीं तुमच्या मुलांनीं आमच्या
मुलांस म्हणूं नये. २८ आम्हीं म्हटलें, पुढें जेव्हां
ते लोक आम्हांस किंवा आमच्या वंशजांस असें म्हणतील
तेव्हां आम्ही त्यांस सांगूं, परमेश्वराच्या वेदीचा नमुना
पाहा; आमच्यां पूर्वजांनीं ती होमबलि अथवा यज्ञबलि
अर्पावयासाठीं केली नाहीं, तर ती तुमच्याआमच्यामध्यें
साक्ष म्हणून आहे. २९ आमचा देव परमेश्वर यास
होमार्पण, अन्नार्पण व यज्ञार्पण करण्यासाठीं आमचा
देव परमेश्वर याची त्याच्या निवासमंडपासमोर असलेल्या
वेदीखेरीज दुसरी वेदी बांधून परमेश्वराविरुद्ध बंडावा
करण्याचें आणि प्रभूला अनुसरावयाचें आज सोडून देणें
आमच्या हातून कदापि न घडो.

३० रऊबेन वंश, गाद वंश व मनश्शाचा अर्धा वंश
यांतील लोकांचें हें म्हणणें ऐकून फिनहास याजक व
त्याजबरोबर असलेले इस्राएल वंशाचे सरदार यांचें समा-
धान झालें. ३१ तेव्हां एलाजार याजकाचा पुत्र फिनहास
यानें रऊबेन, गाद व मनश्शे यांच्या वंशजांस म्हटलें,
यांत तुम्हीं कांहीं परमेश्वराचा गुन्हा केला नाहीं म्हणून
आमची आज खात्री झाली आहे कीं परमेश्वर आमच्या-
मध्यें आहे; तुम्हीं आतां इस्राएल लोकांस परमेश्वराच्या
हातून बचाविलें आहे. ३२ तेव्हां एलाजार याजकाचा
पुत्र फिनहास व सरदार हे रऊबेनी व गादी यांपासून
निघून गिलादांतून कनान देशीं इस्राएल लोकांकडे परत
गेले व त्यांनीं त्यांस हा वृत्तांत सांगितला. ३३ तेव्हां
इस्राएल लोकांचें समाधान होऊन त्यांनीं परमेश्वराचा
धन्यवाद केला आणि रऊबेनी व गादी यांच्याशीं
लढण्याविषयीं अथवा ते राहतात तो देश उध्वस्त
करण्याविषयीं त्यांनीं पुन्हा गोष्ट काढिली नाहीं.
३४ रऊबेनी आणि गादी यांनीं म्हटलें कीं परमेश्वर
हाच देव आहे, याची तुमच्याआमच्यामध्यें साक्ष
म्हणून ही वेदी आहे; यावरून त्यांनीं तिचें नांव [illegible]
(साक्ष) असें ठेविलें.

२३ १ इस्राएलांस परमेश्वरानें त्यांच्या आस-
पासच्या सर्व शत्रूंपासून स्वास्थ्य दिल्यावर
बराच काळ लोटला; आणि यहोशवा वृद्ध
व वयातीत झाला; २ तेव्हां यहोशवानें अखिल
इस्राएलांस म्हणजे अर्थात् त्यांचे वडील जन, त्यांचे
प्रमुख, त्यांचे न्यायाधीश आणि त्यांचे अमलदार यांस
बोलावून आणून म्हटलें, मी आतां वृद्ध व वयातीत
झालों आहें; ३ तुमच्यासाठीं तुमचा देव परमेश्वर
यानें या सर्व राष्ट्रांचें काय केलें हें तुम्हीं पाहिलें आहे;
तुमच्यासाठीं लढला तो तुमचा देव परमेश्वर. ४ पाहा
हीं अवशिष्ट राष्ट्रें आणि ज्या राष्ट्रांचा मीं संहार केला
आहे त्यांचा सगळा देश जो यार्देनेपासून मावळतीस
मोठ्या समुद्रापर्यंत आहे तो मीं तुम्हांस तुमच्या
वंशाचें वतन व्हावें म्हणून वांटून दिला आहे;
५ आणि तुमचा देव परमेश्वर त्यांस तुमच्यापुढून
घालवील आणि तुमच्या नजरेपुढून हाकून देईल;
तुमचा देव परमेश्वर यानें सांगितल्याप्रमाणें तुम्ही
त्याच्या भूमीचें वतन पावाल. ६ यास्तव मोठी हिंमत

धरा, मोशाच्या नियमशास्त्राच्या ग्रंथांत जें लिहिलें
आहे तें सगळें मान्य करून पाळा, त्यापासून उजवी-
डावीकडे वळूं नका; ७ तुमच्यामध्यें जीं राष्ट्रें राहिलीं
आहेत त्यांशीं मिळून जाऊं नका; त्यांच्या देवांचें
नांवहि घेऊं नका, त्यांच्या नांवाची शपथ कोणाला
वाहावयास लावूं नका, त्यांची उपासना करूं नका;
त्यांस नमूं नका; ८ तर तुम्ही आजवर आपला देव
परमेश्वर याला धरून राहिलां आहां तसेंच राहा.
९ परमेश्वरानें तुमच्यापुढून मोठमोठीं व बलाढ्य राष्ट्रें
घालवून दिलीं आहेत, तुमच्यासमोर तर आजवर
कोणीहि टिकला नाहीं. १० तुमच्यांतला एक जण
सहस्रांस पळवून लावील, कारण तुम्हांस सांगितल्या-
प्रमाणें तुमच्यासाठीं लढणारा प्रत्यक्ष तुमचा देव
परमेश्वर आहे. ११ यास्तव तुमचा देव परमेश्वर
याजवर तुमचें प्रेम राहील अशी खबरदारी घ्या;
१२ पण जर तुम्ही कोणत्याहि प्रकारें त्याजपासून परा-
ङ्मुख व्हाल, तुमच्यांत वस्ती करून असलेल्या अवशिष्ट
राष्ट्रांस जाऊन मिळाल व त्यांच्याशीं शरीरसंबंध करून
दळणवळण ठेवाल १३ तर हें पक्कें समजा कीं यापुढें
तुमचा देव परमेश्वर या राष्ट्रांस तुमच्या नजरेपुढून
दूर घालवून देणार नाहीं, तर तीं तुम्हांस पाश व सांपळा,
तुमच्या कुशीला चाबूक व डोळ्यांला कांटे अशीं
होतील; आणि अखेरीस जी उत्तम भूमि तुमचा
देव परमेश्वर यानें तुम्हांस दिली आहे तींतून तुमचा
नायनाट होईल. १४ पाहा, मी आज सर्व दुनियेच्या
रहाटीप्रमाणें जाणार; तुम्हां सर्वांच्या मनाची व
चित्ताची खात्री झाली आहे कीं आपला देव
परमेश्वर यानें आपल्यासंबंधानें ज्या ज्या हिताच्या
गोष्टी सांगितल्या त्यांतली एकहि कमी पडली नाहीं;
त्या सर्व तुम्हांसंबंधानें झाल्या, एकहि गोष्ट कमी पडली
नाहीं. १५ तुमचा देव परमेश्वर यानें तुम्हांस सांगित-
लेल्या सर्व हिताच्या गोष्टी ज्याप्रमाणें घडून आल्या
त्याप्रमाणेंच अहिताचे प्रसंग परमेश्वर तुम्हांवर
गुजरवून जी उत्तम भूमि तुमचा देव परमेश्वर यानें
तुम्हांस दिली आहे तींतून तुमचा नायनाट करील.
१६ तुमचा देव परमेश्वर यानें जो करार पाळण्याची
तुम्हांस आज्ञा दिली आहे त्याचें उल्लंघन करून अन्य
देवांची उपासना कराल व त्यांस नमाल तर परमेश्वराचा
कोप तुम्हांवर भडकेल आणि जो उत्तम देश त्यानें
तुम्हांस दिला आहे त्यांतून तुमचा नायनाट त्वरित होईल.

२४ १ नंतर यहोशवानें इस्राएल वंशांच्या सर्व
लोकांस शखेम येथें जमविलें; आणि इस्राएल
लोकांचे वडील जन, त्यांचे प्रमुख, त्यांचे
न्यायाधीश व त्यांचे अमलदार यांस बोलावूं पाठविलें;
आणि ते देवासमोर हजर झाले. २ यहोशवा सर्व
लोकांस म्हणाला, इस्राएलाचा देव परमेश्वर म्हणतो,
प्राचीन काळीं अब्राहाम व नाहोर यांचा पिता तेरह
आदिकरून तुमचे पूर्वज फरात महानदापलीकडे राहत
असत व ते अन्य देवांची उपासना करीत असत.
३ तुमचा मूळपुरुष अब्राहाम यास महानदाच्या पली-
कडून मीं आणिलें, कनान देशभर फिरविलें, त्याचा
वंश बहुगुणित केला व त्यास इसहाक दिला. ४ मग
मीं इसहाकास याकोब व एसाव हे दिले, आणि
एसावास सेईर डोंगर वतन करून दिला; याकोब हा
आपल्या मुलांबाळांसह मिसर देशीं गेला. ५ नंतर मीं
मोशे आणि अहरोन यांस पाठवून मिसर देशांत जीं
कृत्यें केलीं तेणेंकरून त्या देशास पीडिलें; नंतर मीं
तुम्हांस बाहेर आणिलें. ६ मीं तुमच्या पूर्वजांस मिसर
देशांतून काढून आणिलें; मग तुम्ही समुद्रापर्यंत येऊन
पोहंचलां आणि मिसरी लोकांनीं रथ व स्वार यांसह
तांबड्या समुद्रापर्यंत तुमचा पाठलाग केला. ७ त्यांनीं
परमेश्वराचा धावा केला तेव्हां त्यानें तुमच्या व
मिसऱ्यांच्या दरम्यान अंधार पाडिला आणि त्यांजवर
समुद्र आणून त्यांस गडप केलें; मिसर देशांत मीं जें
कांहीं केलें तें तुम्हीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलें; नंतर
रानांत तुमची वस्ती बहुत दिवस झाली. ८ मग मीं
तुम्हांस यार्देनेच्या पूर्वेस राहणाऱ्या अमोरी लोकांच्या
देशांत आणिलें; ते तुम्हांशीं लढले; मीं त्यांना तुमच्या
हातीं दिलें व तुम्हीं त्यांच्या देशाचा ताबा घेतला;
तुमच्यापुढून मीं त्यांचा संहार केला. ९ नंतर मवाबाचा

राजा सिप्पोरपुत्र बालाक यानें उठून इस्राएलाशीं
युद्ध केलें; तुम्हांस शाप देण्यासाठीं त्यानें बौराचा
पुत्र बलाम यास बोलावून आणिलें; १० पण मीं
बलामाचें ऐकलें नाहीं; त्यानें तुम्हांस उलट आशीर्वाद
दिला; या प्रकारें मीं तुम्हांस त्याच्या हातांतून
सोडविलें. ११ तुम्ही यार्देन नदी उतरून यरीहोस
आलां आणि यरीहोचे लोक आणि अमोरी, परिज्जी,
कनानी, हित्ती, गिर्गाशी, हिव्वी व यबूसी यांनीं
तुम्हांशीं लढाई केली तेव्हां मीं त्यांस तुमच्या हातीं
दिलें. १२ मीं तुमच्या आघाडीस गांधीलमाशा
पाठविल्या व त्यांनीं अमोऱ्यांचे दोन राजे तुम्हांपुढून
हाकून दिले; हें काम तुमच्या तरवारीनें अथवा
धनुष्यानें झालें नाहीं. १३ मग ज्या जमिनीवर तुम्हीं कष्ट
केले नाहींत अशी भूमि मीं तुम्हांस दिली; जीं नगरें
तुम्हीं बांधिलीं नाहींत त्यांत तुम्हीं वसत आहां, जे
द्राक्षांचे मळे व जैतुनांचे बाग तुम्हीं लाविले नाहींत
त्यांचा उपज तुम्ही खात आहां. १४ तर आतां परमे-
श्वराचें भय धरा, त्याची सेवा सात्विक व खऱ्या मनानें
करा; आणि महानदापलीकडे व मिसर देशांत जे
देव तुमच्या पूर्वजांनीं पुजिले ते टाकून देऊन परमे-
श्वराची सेवा करा. १५ परमेश्वराची सेवा करणें हें
तुम्हांस गैर दिसत असलें तर तुम्ही कोणाची सेवा
करणार हें आज ठरवा; महानदापलीकडे तुमच्या
पूर्वजांनीं जे देव पुजिले त्यांची, किंवा तुम्ही राहत
आहां त्या देशांतल्या अमोऱ्यांच्या देवांची? मी आणि
माझें घराणें तर परमेश्वराची सेवा करणार. १६ तेव्हां
लोकांनीं उत्तर दिलें, परमेश्वराचा त्याग करून अन्य
देव पुजणें हें आम्हांकडून न घडो; १७ कारण आमचा
देव परमेश्वर यानेंच आम्हांस व आमच्या पूर्वजांस
मिसर देशांतून, दास्यगृहांतून बाहेर आणिलें; त्यानेंच
आमच्या नजरेसमोर मोठमोठे चमत्कार केले आणि
ज्या वाटेनें आम्हीं प्रवास केला आणि ज्या लोकांमधून
आम्हीं मार्गक्रमण केलें त्यांत आमचें त्यानें रक्षण केलें;
१८ आणि या देशांत राहणारे अमोरी वगैरे सर्व
लोकांस त्यानें आमच्यापुढून घालवून दिलें; आम्हीहि
परमेश्वराची सेवा करणार, कारण तोच आमचा देव.
१९ यहोशवा लोकांस म्हणाला, तुमच्याकडून पर-
मेश्वराची सेवा घडणें नाहीं; कारण तो पवित्र देव आहे;
तो ईर्ष्यावान् देव आहे; तो तुमच्या अधर्माची व तुमच्या
पातकांची क्षमा करावयाचा नाहीं. २० तुम्ही पर-
मेश्वराचा त्याग करून अन्य देव पुजाल, तर जो तुमचें
कल्याण करीत आला आहे तो तुम्हांस प्रतिकूळ होऊन
तुमचें अकल्याण करील, तुमचा संहार करील. २१ लोक
यहोशवास म्हणाले, नाहीं, नाहीं, आम्ही परमेश्वराचीच
सेवा करणार. २२ यहोशवा लोकांस म्हणाला, तुम्हीं
सेवेसाठीं परमेश्वर निवडिला आहे याविषयीं तुमचे
तुम्हीच साक्षी आहां. ते म्हणाले, आम्हीच साक्षी
आहों. २३ यहोशवा म्हणाला, आपल्यामधले अन्य देव
तुम्ही टाकून द्या, आपलें चित्त इस्राएलाचा देव पर-
मेश्वर याजकडे लावा. २४ लोक यहोशवास म्हणाले,
आमचा देव परमेश्वर याचीच आम्ही सेवा करणार
आणि त्याचीच वाणी आम्ही ऐकणार. २५ तेव्हां यहो-
शवानें त्या दिवशीं त्या लोकांकडून करार करविला
आणि शखेमांत त्यांस विधि व नियम लावून दिले.

२६ ह्या गोष्टी यहोशवानें देवाच्या नियमशास्त्राच्या
ग्रंथांत लिहून ठेविल्या आणि एक मोठी शिळा घेऊन
परमेश्वराच्या पवित्रस्थानाजवळील एका एला झाडा-
खालीं ती उभी केली. २७ यहोशवा सर्व लोकांस म्हणाला,
ही शिळा आपली साक्ष होईल कारण परमेश्वरानें
आम्हांस सांगितलेलीं सर्व वचनें हिनें ऐकलीं आहेत;
एखादे वेळीं तुम्ही परमेश्वराचा त्याग कराल म्हणून ही
शिळा तुमची साक्ष म्हणून ठेविली आहे. २८ मग यहो-
शवानें लोकांस त्यांच्या त्यांच्या वतनांकडे रवाना केलें.

२९ ह्या गोष्टी घडल्यानंतर परमेश्वराचा सेवक
नूनाचा पुत्र यहोशवा आपल्या वयाच्या एकशेंदहाव्या
वर्षी मरण पावला. ३० एफ्राइमाच्या डोंगराळ प्रदेशांत
गाश नामक डोंगराच्या उत्तरेस तिम्नाथ-सेरह येथें त्याच्या
वतनभागाच्या सीमेवर त्यांनीं त्याला मूठमाती दिली. ३१
यहोशवाच्या हयातींत आणि यहोशवाच्या मरणानंतर
जीवंत राहिलेल्या ज्या वडील लोकांस परमेश्वरानें

इस्राएलासाठीं काय काय केलें हें विदित होतें त्यांच्या हयातींत इस्राएल लोकांनीं परमेश्वराची सेवा केली. ३२ योसेफाच्या अस्थि इस्राएल लोकांनीं मिसर देशांतून आणिल्या होत्या त्या शखेम येथें एके जागीं पुरिल्या; ही जागा याकोबानें शखेमाचा बाप हमोर याच्या वंशजांकडून शंभर कसीतो देऊन विकत घेतली होती; हें ठिकाण योसेफवंशजांचें वतन झालें. ३३ नंतर अहरोनाचा पुत्र एलाजार हा मृत्यु पावला; त्याला त्यांनीं एफ्राइमाच्या डोंगराळ प्रांतांत त्याचा पुत्र फिनहास याचें गांव गिबा येथें मूठमाती दिली.

# शास्ते



१ यहोशवाच्या मृत्यूनंतर इस्राएल लोकांनीं
१ परमेश्वरास विचारिलें कीं कनानी लोकांशीं युद्ध
करावयासाठीं आमच्यातर्फे पहिल्यानें कोणीं स्वारी
करावी? २ परमेश्वरानें सांगितलें; यहूदानें प्रथम सामना
करावा; पाहा, हा देश मीं त्याच्या हातीं दिला आहे.
३ यहूदा आपला बंधु शिमोन यास म्हणाला, मजबरोबर
माझ्या वतनांत ये, म्हणजे आपण कनान्यांशीं युद्ध
करूं; तुझ्या वतनांत मीहि तुजबरोबर येईन; तेव्हां
शिमोन त्याजबरोबर गेला. ४ मग यहूदानें स्वारी केली;
परमेश्वरानें कनानी व परिज्जी यांस त्यांच्या हातीं दिलें
व त्यांनीं बेजेक येथें त्यांच्या दहा हजार लोकांचा संहार
केला. ५ बेजेक येथें त्यांची अदोनी-बेजेकाशीं गांठ पडली
तेव्हां त्यांनीं त्यांशीं लढून कनानी व परिज्जी यांचा
संहार केला. ६ अदोनी-बेजेक पळून गेला, तेव्हां त्यांनीं
त्याचा पाठलाग करून त्यास पकडिलें आणि त्याच्या
हातापायांचे आंगठे कापून टाकिले. ७ तेव्हां अदोनी-
बेजेक म्हणाला, हातापायांचे आंगठे कापलेले सत्तर
राजे माझ्या मेजाखालीं तुकडे वेचीत असत; माझ्या
करण्याप्रमाणें देवानें मला बदला दिला. मग ते त्यास
यरुशलेमास घेऊन आले, तेथें तो मृत्यु पावला.

८ यहूदा वंशाच्या लोकांनीं यरुशलेम लढून घेतलें,
त्यावर तरवार चालविली व त्या नगरास आग लाविली.
९ नंतर यहूदा वंशाचे लोक डोंगराळ प्रदेश, दक्षिण
देश आणि तळवटीचा देश यांत राहणाऱ्या कनान्यांशीं
लढावयास गेले. १० हेब्रोनांत राहणाऱ्या कनान्यांवर
यहूदाच चढून गेला व त्यांनीं शेशय, अहीमन व
तल्मय यांचा वध केला; हेब्रोनाचें पूर्वीचें नांव किर्याथ-
आर्बा होतें. ११ तेथून दबीरच्या रहिवाश्यांवर त्यानें
स्वारी केली; दबीरचें पूर्वीचें नांव किर्याथ-सेफर होतें.
१२ कालेब म्हणाला, जो किर्याथ-सेफर याशीं लढून तें
हस्तगत करील त्यास मी आपली कन्या अकसा ही
देईन. १३ तेव्हां कालेब याचा धाकटा बंधु कनाज
याचा पुत्र अथनिएल यानें तें शहर हस्तगत केलें तेव्हां
त्यानें आपली कन्या अकसा ही त्यास बायको करून
दिली. १४ ती आली तेव्हां आपल्या बापापासून त्यानें
कांहीं जमीन मागून घ्यावी अशी तिनें त्यास भर दिली;
ती गाढवावरून उतरली तेव्हां कालेबानें तिला विचारिलें,
तुला काय पाहिजे? १५ ती त्यास म्हणाली, मला एक
देणगी द्या; तुम्हीं मला दक्षिणेकडची जमीन दिली आहेच,
तर मला पाण्याचे झरेहि द्या; तेव्हां कालेबानें तिला
वरचे व खालचे झरे दिले.

१६ मोशाचा सासरा[२] केनी याचे वंशज यहूदा
वंशाच्या लोकांसहित खजुरींच्या नगराहून यहूदाच्या
रानांत गेले; हें नगर अरादाच्या दक्षिणेस आहे; तेथें
जाऊन ते त्या लोकांबरोबर राहिले. १७ मग यहूदानें
आपला भाऊ शिमोन याजबरोबर जाऊन सफाथ येथील

१ उत्प. ३३:१९ पाहा.
२ **अथवा:** मेहुणा.

राहणारे कनानी यांस मार देऊन त्यांचा अगदीं
विध्वंस केला. त्या नगराचें नांव हर्मा असें पडलें.
१८ याखेरीज यहूदानें गज्जा, अष्कलोन आणि एक्रोन
हीं त्यांच्या शिवारांसह घेतलीं. १९ परमेश्वर यहूदाच्या
बरोबर होता; त्यानें डोंगराळ प्रदेशांतील रहिवासी
घालवून दिले; पण तळवटींत राहणाऱ्या लोकांस त्याला
घालवून देतां येईना, कारण त्यांच्यापाशीं लोखंडी रथ
होते. २० मोशाच्या सांगण्याप्रमाणें त्यांनीं हेब्रोन
नगर कालेबास दिलें व त्यानें तेथून अनाकाच्या तिघां
पुत्रांस घालवून दिलें. २१ यरुशलेमांत राहणाऱ्या
यबूसी लोकांस बन्यामिन्यांनीं घालवून दिलें नाहीं;
आजपर्यंत यबूसी लोक यरुशलेमांत बन्यामिन्यांबरोबर
वस्ती करून आहेत.

२२ योसेफाच्या वंशजांनींहि बेथेलावर स्वारी
केली; परमेश्वर त्यांच्याबरोबर होता. २३ बेथेल
नगर हेरण्यास योसेफाच्या घराण्यानें मनुष्य पाठविलें;
त्या नगराचें पूर्वीचें नांव लूज होतें. २४ त्या हेरांनीं
त्या नगरांतून एक मनुष्य बाहेर निघतांना पाहिला;
त्यास त्यांनीं म्हटलें, नगरांत जाण्याचा मार्ग आम्हांस
दाखीव म्हणजे आम्ही तुजवर कृपा करूं. २५ तेव्हां
त्यानें त्यांस नगरांत जाण्याचा मार्ग दाखविला, आणि
त्यांनीं त्या नगरावर तरवार चालविली; पण त्या
मनुष्यास त्यांनीं त्याच्या घरादारासुद्धां वांचविलें.
२६ त्या मनुष्यानें हित्ती लोकांच्या देशीं जाऊन एक
नगर वसविलें व त्याचें नांव लूज ठेविलें; आजपर्यंत
तेंच नांव त्या नगरास आहे.

२७ मनश्शानें बेथ-शान, तानख, दोर, इब्लाम आणि
मगिद्दो हीं नगरें व त्यांच्या आसपासचीं खेडींपाडीं
यांतील रहिवाश्यांस घालवून दिलें नाहीं; कनान्यांनीं
त्या प्रांतांत राहण्याचा हट्ट धरिला. २८ पुढें इस्राएल
लोक प्रबळ झाले तेव्हां त्यांनीं कनानी लोकांस बिगार-
काम करावयास लाविलें; सगळ्यांना हाकून दिलें नाहीं.

२९ एफ्राइमानें गेजेर येथील राहणाऱ्या कनान्यांस
घालवून दिलें नाहीं; ते कनानी गेजेर येथें त्यांच्या-
मध्यें वस्ती करून राहिले.

३० जबुलून यानें कित्रोन व नहलोल येथील
रहिवाश्यांस घालवून दिलें नाहीं; कनानी त्यांमध्यें
वस्ती करून बिगारकाम करूं लागले.

३१ आशेरानें अक्को, सीदोन, अहलाब, अकजीब,
हेल्बा, अफीक व रहोब यांतील रहिवाश्यांस घालवून
दिलें नाहीं; ३२ म्हणून आशेर वंशाचे लोक त्या
देशच्या कनानी रहिवाश्यांमध्यें वस्ती करून राहिले;
कारण त्यांनीं त्यांस घालवून दिलें नाहीं.

३३ नफतालीच्या वंशजांनीं बेथ-शेमेश व बेथ-अनाथ
येथील रहिवाश्यांस घालवून दिलें नाहीं, तर ते त्या
देशच्या कनानी रहिवाश्यांमध्यें वस्ती करून राहिले;
पण बेथ-शेमेश व बेथ-अनाथ येथील रहिवासी त्यांचें
बिगारकाम करूं लागले.

३४ अमोरी लोकांनीं दानाच्या वंशजांस डोंगरी
प्रदेशांत पळवून लाविलें; ते त्यांस तळवटींत येऊं
देईनात; ३५ अमोऱ्यांनीं हेरेस पहाड, अयालोन व
शालबीम येथेंच राहण्याचा हट्ट धरिला; पण योसेफाचें
घराणें प्रबळ झाल्यावर अमोऱ्यांस बिगारकाम करणें
भाग पडलें. ३६ अमोऱ्यांचा प्रदेश अक्राब्बीमाचा
चढाव आणि सेला येथून पुढें होता.

२ १ परमेश्वराचा दूत गिल्गालाहून बोखीम येथें
जाऊन म्हणाला, मीं तुम्हांस मिसर देशांतून
काढून तुमच्या पूर्वजांस आणभाक करून देऊं
केलेल्या देशांत आणिलें, आणि मी तुम्हांस म्हणालों
होतों कीं तुमच्याशीं केलेला करार मी कधीं मोडा-
वयाचा नाहीं; २ तुम्हीं या देशच्या रहिवाश्यांशीं
कांहीं करारमदार करूं नयेत; तुम्हीं त्यांच्या
वेद्या मोडून टाकाव्या, पण माझी वाणी तुम्हीं
ऐकली नाहीं तें कां? ३ यास्तव मीहि म्हणालों, मी
त्या लोकांस तुम्हांपुढून घालवून देणार नाहीं तर ते
तुमच्या कुशीला कांट्यांसारखे होतील आणि त्यांचे
देव तुम्हांस पाश होतील. ४ परमेश्वराचा दूत
सगळ्या इस्राएल लोकांस हे शब्द बोलला तेव्हां
त्यांनीं मोठा हेल काढून आकांत केला. ५ त्यांनीं
त्या स्थलाचें नांव बोखीम (आकांत करणारें) असें

ठेविलें; तेथें त्यांनीं परमेश्वरास यज्ञ केले.
६ यहोशवानें इस्राएल लोकांस निरोप दिला तेव्हां
ते सर्व आपआपल्या वतनाचा ताबा घ्यावयास गेले.
७ यहोशवाच्या हयातींत आणि यहोशवा मरण
पावल्यावर जे वडील लोक मागें राहिले त्या सगळ्यांच्या
हयातींत म्हणजे परमेश्वरानें इस्राएल लोकांसाठीं
केलेलें सगळें थोर कार्य ज्यांनीं पाहिलें होतें त्यांच्या
हयातींत इस्राएल लोक परमेश्वराची सेवा करीत राहिले.
८ परमेश्वराचा सेवक नूनाचा पुत्र यहोशवा हा एकशें-
दहा वर्षांचा होऊन मरण पावला. ९ एफ्राइमाच्या
डोंगराळ प्रदेशांतील गाश पर्वताच्या उत्तरेस तिम्राथ-
हेरेस येथें त्याच्या वतनाच्या सीमेवर त्यांनीं त्यास मूठ-
माती दिली. १० त्या पिढींतील सर्व लोक आपल्या
पितरांस जाऊन मिळाल्यावर त्यांच्यामागून जी
दुसरी पिढी उत्पन्न झाली तिला परमेश्वराची व त्यानें
इस्राएलासाठीं केलेल्या कार्याची ओळख नव्हती.
११ तेव्हां इस्राएल लोक परमेश्वराच्या दृष्टीनें
वाईट तें करून बाल देवांची उपासना करूं लागले;
१२ त्यांच्या पूर्वजांचा देव जो परमेश्वर, ज्यानें त्यांस
मिसर देशांतून बाहेर काढिलें त्याचा त्यांनीं त्याग केला;
अन्य देवांचें म्हणजे आपल्या आसपास असलेल्या
लोकांच्या देवांचें अनुसरण करून ते त्यांच्या चरणीं
लागले आणि त्यांनीं परमेश्वरास क्रोधाविष्ट केलें. १३ पर-
मेश्वराचा त्याग करून त्यांनीं बाल व अष्टरोथ यांची
भक्ति केली; १४ म्हणून इस्राएलावर परमेश्वराचा कोप
भडकला, त्यानें त्यांस लुटारूंच्या हातीं दिलें, आणि त्यांनीं
त्यांस लुटिलें; त्यानें त्यांस त्यांच्या आसपासच्या शत्रूंच्या
हवालीं केलें म्हणून त्यांना आपल्या शत्रूंसमोर यापुढें
टिकाव धरवला नाहीं. १५ परमेश्वरानें त्यांस शपथ-
पूर्वक सांगितलें होतें त्याप्रमाणें जेथेंजेथें ते जात
तेथेंतेथें त्यांच्यावर परमेश्वराचा हात पडून त्यांचें
अहित होई, आणि ते फार संकटांत पडत. १६
परमेश्वर त्यांच्यांत शास्ते उत्पन्न करी व ते त्यांस
लुटणाऱ्यांच्या हातून सोडवीत. १७ तरी ते आपल्या
शास्त्यांचें ऐकत नसत; ते व्यभिचारी मतीनें अन्य
देवांच्या मागें लागून त्यांच्या चरणीं लागत. त्यांचे
पूर्वज परमेश्वराच्या आज्ञा पाळीत तो मार्ग सोडून ते
त्वरित बहकले; आपल्या पूर्वजांप्रमाणें ते वागले
नाहींत. १८ जेव्हां जेव्हां परमेश्वर त्यांच्यासाठीं शास्ते
निपजवी तेव्हां त्या प्रत्येकाच्या बरोबर परमेश्वर
असून त्या शास्त्याच्या हयातींत तो त्यांस त्यांच्या
शत्रूंच्या हातून बचावीत असे; कारण त्यांजवर लोक
जुलम करीत व त्यांस गांजीत यामुळें ते कण्हत हें पाहून
परमेश्वराला पस्तावा झाला. १९ तरी पण शास्ता मरण
पावला म्हणजे ते पुनः उलटून आपल्या वडिलांपेक्षांहि
अधिक बिघडत आणि अन्य देवांची भक्ति करून
त्यांच्या चरणीं लागत; ते आपला वर्तनक्रम व हट्ट
सोडीत नसत. २० तेव्हां इस्राएलावर परमेश्वराचा क्रोध
भडकून तो म्हणे, मीं यांच्या वडिलांशीं केलेला करार
या राष्ट्रानें उल्लंघिला आहे, यानें माझी वाणी ऐकली
नाहीं; २१ म्हणून यहोशवाच्या मृत्युसमयीं जीं राष्ट्रें
वांचून राहिलीं त्यांपैकीं कोणासहि मी इतःपर त्यांच्या-
पुढून घालवून देणार नाहीं; २२ आणि यावरून त्यांच्या-
द्वारें मी इस्राएलाची परीक्षा करीन आणि त्यांचे पूर्वज
माझ्या मार्गानें चालत होते त्याप्रमाणें ते चालतात कीं
नाहीं हें पाहीन. २३ यास्तव परमेश्वरानें त्या राष्ट्रांस
एकदम घालवून दिलें नाहीं, राहूं दिलें आणि त्यांस
यहोशवाच्या हातीं दिलें नाहीं.

३ १ कनान देशांतील लढायांचा ज्या इस्राएल
लोकांना अनुभव नव्हता त्यांस कसास लावण्यासाठीं
परमेश्वरानें कांहीं राष्ट्रें देशांत राहूं दिलीं; २ यांत
हेतु हाच होता कीं इस्राएल लोकांच्या पिढ्यांपैकीं
निदान ज्यांस लढाईचा मुळींच अनुभव नव्हता त्यांस
तिचा अनुभव घडावा व त्यांस तिचें शिक्षण द्यावें. ३ जीं
राष्ट्रें राहूं दिलीं तीं हीं: पलिष्ट्यांचे पांच सरदार आणि
सर्व कनानी, सीदोनी आणि बाल-हर्मोन डोंगरापासून
हमाथाच्या घाटापर्यंत लबानोन डोंगरांत राहणारे
हिव्वी. ४ यांस राहूं देण्यांत हेतु हाच कीं ज्या आज्ञा
परमेश्वरानें मोशाच्या द्वारें इस्राएल लोकांच्या वडिलांस
दिल्या त्या ते पाळितात किंवा नाहीं याबद्दल त्यांस

कसास लावावें. ५ या प्रकारें इस्राएल लोक कनानी,
हित्ती, अमोरी, परिज्जी, हिव्वी व यबूसी यांच्यामध्यें
वस्ती करून राहिले; ६ ते त्यांच्या मुलींशीं विवाह
करूं लागले, आपल्या मुली त्यांच्या मुलांस देऊं लागले
आणि त्यांच्या देवांची भक्ति करूं लागले.

७ इस्राएल लोकांनीं परमेश्वराच्या दृष्टीनें वाईट तें
केलें, आपला देव परमेश्वर यास ते विसरले आणि
बाल व अशेरा या मूर्तींची भक्ति करूं लागले; ८ म्हणून
इस्राएलावर परमेश्वराचा कोप भडकला आणि त्यानें
त्यास मेसोपटेम्याचा राजा कुशन-रिशाथईम याच्या हातीं
दिलें, आणि या प्रकारें इस्राएल लोकांनीं आठ वर्षेंपर्यंत
कुशन-रिशाथईम याचें दास्य केलें. ९ इस्राएल लोकांनीं
परमेश्वराचा धावा केला तेव्हां त्यानें त्यांच्याप्रीत्यर्थ
कालेबाचा धाकटा बंधु कनान याचा पुत्र अथनिएल यास
सोडविणारा म्हणून योजिलें; आणि त्यानें त्यांची सुटका केली.
१० त्याजवर परमेश्वराचा आत्मा उतरला व तो इस्रा-
एलाचा शास्ता झाला; तो लढाईस निघाला तेव्हां पर-
मेश्वरानें मेसोपटेम्याचा राजा कुशन-रिशाथईम यास
त्याच्या हातीं दिलें व त्याजवर त्याचें वर्चस्व झालें;
११ त्यानंतर चाळीस वर्षें देशास स्वास्थ्य प्राप्त झालें;
मग कनानाचा पुत्र अथनिएल मृत्यु पावला.

१२ पुनः इस्राएल लोक परमेश्वराच्या दृष्टीनें जें
वाईट तें करूं लागले; त्यांनीं जें केलें तें परमेश्वराच्या
दृष्टीनें वाईट होतें म्हणून परमेश्वरानें मवाबाचा राजा
एग्लोन याचें इस्राएलावर प्राबल्य केलें. १३ तेव्हां
त्यानें अम्मोनी व अमालेकी यांस आपल्याकडे जमवून
इस्राएल लोकांवर चाल केली आणि त्यांजवर मारा
करून खजुरींचें नगर हस्तगत केलें. १४ यास्तव इस्रा-
एल लोकांनीं मवाबाचा राजा एग्लोन याचें अठरा वर्षें
दास्य केलें. १५ मग इस्राएल लोकांनीं परमेश्वराचा
धावा केला, तेव्हां परमेश्वरानें गेराचा पुत्र एहूद
याला त्यांस सोडविणारा म्हणून योजिलें; तो बन्यामिनी
असून डावरा होता; त्याच्या हस्तें इस्राएल लोकांनीं
मवाबाचा राजा एग्लोन यास नजराणा पाठविला.
१६ एहूदानें एक हातभर लांब दुधारी तरवार
आपल्यासाठीं बनवून आपल्या झग्याखालीं उजव्या
मांडीवर बांधिली. १७ त्यानें मवाबाचा राजा
एग्लोन याच्यापुढें नजराणा सादर केला; एग्लोन
हा फार लठ्ठ पुरुष होता; १८ नजराणा देण्याचें
झाल्यावर त्यानें नजराणा घेऊन आलेल्या लोकांची
रवानगी केली; १९ पण गिल्गालाजवळील पाषाणमूर्ती-
पर्यंत गेल्यावर एहूद स्वतः परत येऊन म्हणाला, राजा,
मला आपल्याशीं कांहीं गुप्त गोष्ट बोलावयाची आहे.
राजा लोकांना म्हणाला, गप्प राहा! तेव्हां त्याच्या-
जवळ उभे असलेले लोक बाहेर गेले. २० एहूद
त्याच्यापाशीं आला त्या समयीं तो हवाशीर माडीवर
एकटा बसला होता. एहूद त्यास म्हणाला, आपणाला
देवाकडला कांहीं संदेश मला सांगावयाचा आहे. हें ऐकून
तो आसनावरून उठला. २१ तेव्हां एहूदानें आपला
डावा हात पुढें करून उजव्या मांडीवरली तरवार
उपसली आणि त्याच्या पोटांत खुपसली; २२ तर-
वारीच्या पात्याबरोबर मूठहि आंत गेली; तें पातें
त्याच्या मेदामध्यें चिकटून राहिलें; कारण ती तरवार
त्याच्या पोटांतून त्यानें बाहेर काढिली नाहीं; ती पश्चात्
भागीं बाहेर निघाली. २३ मग बाहेर देवडीवर
जाऊन एहूदानें माडीचीं कवाडें लावून त्यांस कुलूप
लाविलें. २४ तो निघून गेल्यावर त्याचे चाकर येऊन
पाहतात तों माडीचीं कवाडें लाविलेलीं त्यांच्या दृष्टीस
पडलीं तेव्हां त्यांस वाटलें कीं तो आपल्या माडीवरील
कोठडींत लघुशंका करीत असेल. २५ ते वाट पाहून
पाहून थकले; तो माडीचीं कवाडें उघडीत नाहीं असें
पाहून त्यांनीं किल्ली घेऊन तीं उघडिलीं आणि पाहतात
तों त्यांचा स्वामी मरून भूमीवर पडलेला आहे असें
त्यांच्या दृष्टीस पडलें. २६ ते वाट पाहत होते तेवढ्या
अवकाशांत एहूद पळून पाषाणमूर्तींच्या पलीकडे सईरा
येथें जाऊन पोहंचला. २७ तेथें गेल्यावर त्यानें
एफ्राइमाच्या डोंगराळ प्रदेशांत रणशिंग वाजविलें तेव्हां
त्याच्याबरोबर इस्राएल लोक डोंगरावरून उतरले,
आणि तो त्यांच्यापुढें चालला. २८ तो त्यांस म्हणाला,
माझ्या पाठोपाठ या, कारण परमेश्वरानें तुमचे मवाबी

शत्रु तुमच्या हातीं दिले आहेत. तेव्हां त्यांनीं त्याच्या
पाठोपाठ जाऊन देशाजवळचे यार्देनेचे उतार रोखून
धरिले आणि कोणासहि पार जाऊं दिलें नाहीं.
२९ त्या समयीं त्यांनीं मवाब्यांचे सुमारें दहा हजार
लोक मारिले; ते सर्व धष्टपुष्ट व शूर वीर होते; त्यांच्यां-
तला कोणीहि बचावला नाहीं. ३० या प्रकारें मवाब
त्या दिवशीं इस्राएलाच्या काबूंत आला. यानंतर देशास
ऐशीं वर्षें स्वास्थ्य प्राप्त झालें.

३१ त्यानंतर अनाथाचा पुत्र शमगार याची योजना
झाली; त्यानें सहाशें पलिष्टयांस बैलाच्या पराणीनें जिवें
मारिलें; त्यानेंहि इस्राएलाची सुटका केली.

४ १ एहूद मरण पावल्यावर इस्राएल लोकांनीं
परमेश्वराच्या दृष्टीनें वाईट तें पुनरपि केलें.
२ तेव्हां परमेश्वरानें याबीन नामें कनानी राजा
हासोरांत राज्य करीत होता त्याच्या हातीं त्यांस दिलें;
त्याचा सेनापति सीसरा हा विदेश्यांचें नगर हरोशेथ
येथें राहत असे. ३ त्याजपाशीं नऊशें लोखंडी रथ
असून त्यानें वीस वर्षें इस्राएल लोकांस फार गांजिलें
म्हणून त्यांनीं परमेश्वराचा धावा केला.

४ त्या समयीं लप्पिदोथाची बायको दबोरा संदेष्ट्री
इस्राएलाचा न्यायनिवाडा करीत असे. ५ एफ्राइमाच्या
डोंगराळ प्रदेशांतील रामा व बेथेल यांच्या दरम्यान
दबोरा नामक खजुरीच्या झाडाखालीं तिची बैठक
असे; इस्राएल लोक तिच्याकडे न्यायनिवाड्यासाठीं जात
असत. ६ तिनें अबीनवामाचा पुत्र बाराक यास केदेश-
नफताली येथून बोलावून आणविलें व त्यास सांगितलें,
तूं नफताली व जबुलूनी यांच्यांतले दहा हजार पुरुष
बरोबर घेऊन ताबोर पर्वताकडे कूच करून जा अशी
आज्ञा इस्राएलाचा देव परमेश्वर यानें तुला केली आहे
ना? ७ देव म्हणतो, याबीनाचा सेनापति सीसरा
आपले रथ व आपलें सर्व लष्कर यांसह कीशोन नदी-
पर्यंत येईसें मी करीन आणि त्यांस तुझ्या हातीं देईन.
८ बाराक तिला म्हणाला, तूं मजबरोबर येशील तर
मी जाईन, नाहीं तर जाणार नाहीं. ९ ती म्हणाली,
मी तुजबरोबर अवश्य येईन, पण या स्वारींत तुझी
प्रतिष्ठा व्हावयाची नाहीं, कारण परमेश्वर सीसरा यास
एका स्त्रीच्या हातीं देणार आहे. मग दबोरा उठून
बाराकाबरोबर केदेश येथें गेली. १० बाराकानें
जबुलूनी व नफताली यांस केदेश येथें बोलाविलें;
मग त्यांच्यामागून दहा हजार पुरुष चालले आणि
दबोराहि त्याजबरोबर गेली. ११ मोशाचा सासरा होबाब
याचे वंशज जे केनी त्यांच्यापासून केनी हेबेर हा
वेगळा होऊन केदेशाजवळचें साननीम येथल्या एका
एला वृक्षापाशीं आपला डेरा देऊन राहिला होता.
१२ इकडे सीसरा यास कोणीं खबर दिली कीं अबीन-
वामाचा पुत्र बाराक हा ताबोर पर्वत चढून गेला आहे.
१३ तेव्हां सीसरा यानें आपले नऊशें लोखंडी रथ
आणि आपली सर्व सेना हीं विदेश्यांचें हरोशेथ येथें
कीशोन नदीवर एकवट केलीं. १४ दबोरा बाराकास
म्हणाली, ऊठ, आज परमेश्वरानें सीसऱ्यास तुझ्या
हातीं दिलें आहे; परमेश्वर तुझ्यापुढें निघाला आहे
ना? मग बाराक व त्याच्या पाठोपाठ दहा हजार
पुरुष ताबोर डोंगरावरून उतरले. १५ परमेश्वरानें
सीसरा, त्याचे रथ व सर्व सेना यांचा बाराकासमोर
तरवारीनें धुव्वा उडविला, तेव्हां सीसरा रथावरून
उतरून पायीं पळून गेला. १६ इकडे बाराकानें
विदेश्यांच्या हरोशेथापर्यंत रथांचा व सैन्याचा पाठलाग
केला; आणि सीसरा याची सर्व सेना तरवारीनें पडली;
त्यांतला कोणीहि उरला नाहीं.

१७ सीसरा स्वतः केनी हेबेर याची स्त्री याएल
हिच्या डेऱ्याकडे पायीं पळून गेला; कारण हासोरचा
राजा याबीन आणि केनी हेबेरचें घराणें यांचें सख्य
होतें. १८ तेव्हां याएल ही सीसऱ्यास सामोरी येऊन
त्याला म्हणाली, माझ्या प्रभू, माझ्याकडे या, भिऊं
नका. तेव्हां तो तिच्याकडे डेऱ्यांत गेला व तिनें
त्याला कांबळीखालीं झाकिलें. १९ तो तिला म्हणाला,
मला तहान लागली आहे; थोडें पाणी प्यावयास दे.
तेव्हां तिनें दुधाची बुधली उघडून त्याला दूध प्यावयास
दिलें व त्याजवर पांघरूण घातलें. २० तो तिला

१ अथवा: मेहुणा

म्हणाला, डेऱ्याच्या दाराशीं उभी राहा आणि कोणी
येऊन तुला विचारूं लागला कीं येथें कोणी पुरुष आहे
काय? तर नाहीं म्हणून सांग. २१ मग हेबेराची स्त्री
याएल हिनें डेऱ्याची मेख आणि हातोडा हीं हातीं घेतलीं,
आणि पाय न वाजवितां त्याच्याजवळ जाऊन त्याच्या
कानशिलांत ती ठोकली; ती पार जाऊन जमिनींत रुतली.
तो थकून गेल्यामुळें त्याला गाढ निद्रा लागली होती व
तो तेथल्या तेथें मृत्यु पावला. २२ बारक सीसराचा
पाठलाग करीत आला असतां त्यास याएल सामोरी
येऊन म्हणाली, चल, ज्या पुरुषाचा तूं शोध करीत
आहेस तो मी तुला दाखवितें. तेव्हां तो तिज-
बरोबर गेला, आणि सीसरा मरून पडला आहे आणि
त्याच्या कानशिलांत मेख आहे असें त्यानें पाहिलें.
२३ या प्रकारें त्या दिवशीं कनानाचा राजा याबीन
यास परमेश्वरानें इस्राएल लोकांपुढें पराजित केलें.
२४ इस्राएल लोकांचें प्राबल्य कनानाचा राजा याबीन
याजवर अधिकाधिक होत गेलें व शेवटीं त्यांनीं
कनानाचा राजा याबीन याचा नाश केला.

५ १ त्या दिवशीं दबोरा आणि अबीनवामाचा
पुत्र बाराक यांनीं गाइलेलें कवन हें:
२ इस्राएलाचे नेते पुढें चालले,
लोक स्वसंतोषानें सैन्यांत दाखल झाले,
म्हणून परमेश्वराचा धन्यवाद करा.
३ राजेहो, ऐका; अधिपतींनो कान द्या,
मी स्वतः परमेश्वराला गातें;
इस्राएलाचा देव परमेश्वर याचीं स्तोत्रें गातें.
४ हे परमेश्वरा, तूं सेईराहून प्रयाण केलें,
अदोमाच्या प्रदेशांतून कूच केलें,
तेव्हां पृथ्वी थरारली, आकाशानें जलबिंदु गाळिले.
मेघांनीं जलबिंदु गाळिले.
५ परमेश्वरासमोर डोंगर थरथरां कांपले,
इस्राएलाचा देव परमेश्वर याच्यासमोर तो सीनाय
देखील थरारला.
६ अनाथाचा पुत्र शमगार याच्या काळीं
याएलेच्या काळीं राजमार्ग सुने पडले,
वाटसरूंनीं आडमार्गानें प्रवास केला.
७ मी दबोरा प्रगट होईपर्यंत,
मी इस्राएल लोकांत माता म्हणून प्रसिद्ध होईपर्यंत,
इस्राएलांतलीं खेडींपाडीं ओस पडलीं होतीं.
८ लोकांनीं नवे नवे देव मानिले;
तेव्हां वेशींवेशींनीं संग्राम झाला;
चाळीस हजार इस्राएलांमध्यें
एक तरी ढाल अथवा बरची दृष्टीस पडली काय?
९ माझें मन इस्राएलाच्या अधिपतींकडे लागलें आहे,
ते खुशीनें प्रजेबरोबर सैन्यांत दाखल झाले;
तुम्ही परमेश्वराचा धन्यवाद करा.
१० शुभ्र गर्दभांवर स्वारी करणाऱ्यांनो,
उंची गालिचांवर बसणाऱ्यांनो,
वाटेनें चालणाऱ्यांनो, याविषयीं गा.
११ पाणवठ्यांवर धनुर्धाऱ्यांच्या कोलाहलापासून दूर
निवांत स्थलीं
परमेश्वराच्या न्यायकृत्यांचें,
इस्राएलावरल्या सत्तेसंबंधानें त्याच्या न्यायकृत्यांचें
ते वर्णन करितील.
त्या समयीं परमेश्वराचे प्रजाजन वेशींपाशीं गेले.
१२ जागी हो, जागी हो, दबोरे;
जागी हो, जागी हो, गायन कर;
बाराका ऊठ; अबीनवामाच्या पुत्रा, तूं पाडाव
केलेल्यांस कैदेंत घेऊन जा.
१३ त्या समयीं अवशिष्ट सरदार व लोक खालीं उतरले;
परमेश्वर माझ्याकरितां वीरांविरुद्ध सामना कराव-
यास उतरला.
१४ अमालेकांत ज्यांचीं पाळेंमुळें पसरलीं आहेत ते
एफ्राइमामधून आले;
तुझ्यामागून बन्यामीन तुझ्या सैन्यांत सामील
झाला;
माखीराहून अधिपति आले,
जबुलूनांतून दंडधारण करणारे अमलदार उतरून
आले.
१५ इस्साखाराचे सरदार दबोरेबरोबर होते;

इस्साखार होता तसाच बाराकहि होता;
त्याच्या पाठोपाठ ते खोऱ्यांत धावले.
रऊबेनाच्या जलप्रवाहापाशीं
मोठे मनसोबे झाले.
१६ खिल्लारांसाठीं वाजविलेला पावा ऐकत
तूं मेंढवाड्यांत कां बसलास ?
रऊबेनाच्या जलप्रवाहापाशीं
विचारांची फार छानणी चालली होती.
१७ गिलाद यार्देनेपलीकडेच राहिला;
दान हा आपल्या जहाजांपाशींच कां बसून राहिला ?
आशेर समुद्रतीर धरून बसला,
आपल्या खाड्यांपाशीं बसून राहिला.
१८ जबुलूनाचे लोक आणि नफताली
हे आपल्या डोंगराळ प्रदेशांत जिवावर उदार झाले.
१९ राजे येऊन लढले;
त्या समयीं कनानाचे राजे
मगिद्दोच्या जलप्रवाहापाशीं तानख येथें लढले;
त्यांस कांहीं रुप्याची लूट मिळाली नाहीं.
२० आकाशांतून सेना लढल्या;
ताऱ्यांनीं आपल्या कक्षांतून सिसऱ्याशीं लढाई केली.
२१ कीशोन नदीनें, त्या प्राचीन नदीनें, त्या कीशोन
नदीनें त्यांस वाहून नेलें.
हे जीवा, हिंमत धरून चाल कर.
२२ त्या समयीं घोडे भरधाव उधळले,
ते मजबूत घोडे टापा मारूं लागले,
त्यांच्या टापांचा आवाज झाला.
२३ परमेश्वराचा दूत म्हणतो, मेरोजला शाप द्या,
त्यांतल्या रहिवाश्यांस मोठा शाप द्या;
कारण परमेश्वराचें साहाय्य करावयास,
वीरांविरुद्ध परमेश्वराचें साहाय्य करावयास ते
आले नाहींत.
२४ केनी हेबेर याची स्त्री याएल
ही सगळ्या स्त्रियांमध्यें धन्य !
डेऱ्यांत राहणाऱ्या सर्व स्त्रियांमध्यें ती धन्य !
२५ त्यानें पाणी मागितलें तों तिनें दूध दिलें;
श्रीमंतांस साजे अशा वाटींत तिनें त्याला दहीं
आणून दिलें.
२६ तिनें आपला एक हात मेखेला,
आणि उजवा हात कारागिराच्या हातोड्याला
घातला
तिनें हातोड्यानें सिसऱ्यास मारिलें,
त्याचें शीर फोडून टाकिलें,
त्याचें कानशील मेख ठोकून आरपार विंधिलें.
२७ तिच्या पायांपाशीं तो वाकला, पडला, निश्चल झाला;
तिच्या पायांपाशीं तो वाकला, पडला;
जेथें तो वाकला तेथेंच तो मरून पडला;
२८ खिडकींतून तिनें बाहेर पाहून ओरड केली,
सिसऱ्याच्या आईनें जाळींतून हाक मारिली,
त्याचा रथ यावयास एवढा विलंब कां लागला ?
त्याच्या रथांच्या चाकांस कां खोळंबा झाला ?
२९ तिच्या चतुर स्त्रियांनीं तिला उत्तर दिलें,
स्वतः तिनेंच आपणास उत्तर दिलें :
३० त्यांना लूट मिळाली ती ते वांटून घेत नस-
तील ना ?
एकएका पुरुषास एकएक दोनदोन कुमारिका;
रंगीबेरंगी वस्त्रें, भरजरी रंगीबेरंगी वस्त्रें,
लुटींत मिळालेल्या कुमारिकांच्या माना भूषित
करण्यासाठीं
एक दोन रंगीबेरंगी वस्त्रें सिसऱ्यास मिळालीं
नसतील ना ?
३१ हे परमेश्वरा, तुझे सर्व शत्रु असेच नष्ट होवोत;
पण त्याजवर प्रेम करणारे प्रतापमय उदयभानू-
समान होवोत.
मग देशास चाळीस वर्षे विसावा मिळाला.

६ १ इस्राएल लोकांनीं परमेश्वराच्या दृष्टीनें जें
वाईट तें पुनः केलें, तेव्हां परमेश्वरानें त्यांस
सात वर्षें मिद्यानाच्या हातीं दिलें. २ मिद्यानाचा
हात इस्राएलावर प्रबळ झाला; मिद्यानाच्या भीतीनें
इस्राएल लोकांनीं डोंगरांडोंगरांतून आपणांस राहावया-
साठीं विवरें, गुहा व दुर्ग तयार केले. ३ इस्राएल

लोकांनीं शेतें पेरिल्यावर मिद्यानी, अमालेकी आणि
पूर्वदेशस्थ लोक त्यांच्यावर हल्ला करीत; ४ आणि
गज्जा नगरापर्यंत ते छावणी देऊन भूमीच्या पिकाचा
विध्वंस करीत व इस्राएल लोकांसाठीं अन्न, शेरडेंमेंढरें,
गाईबैल, गाढवें वगैरे कांहींएक शिल्लक राहूं देत नसत.
५ ते आपले पशु व डेरे घेऊन चढाई करीत आणि
टोळधाडीप्रमाणें येत; त्यांचे उंट अगणित होते;
ते देश उजाड करण्यास येत असत. ६ मिद्यानामुळें
इस्राएलाची निकृष्ट अवस्था झाली, तेव्हां इस्राएल
लोकांनीं परमेश्वराचा धावा केला.

७ मिद्यानामुळें इस्राएल लोकांनीं परमेश्वराचा
धावा केला, ८ तेव्हां परमेश्वरानें इस्राएलाकडे एक
संदेष्टा पाठविला; तो त्यांस म्हणाला, इस्राएलाचा देव
परमेश्वर म्हणतो कीं मीं तुम्हांस मिसर देशांतून काढून
आणिलें, दास्यगृहांतून तुम्हांस बाहेर आणिलें;
९ मिसऱ्यांच्या आणि जे कोणी तुम्हांस गांजीत होते
त्या सर्वांच्या हातून तुम्हांस सोडविलें आणि त्यांस
तुमच्यापुढून घालवून देऊन त्यांचा देश तुम्हांस दिला;
१० आणि मी तुम्हांस म्हणालों कीं मीच तुमचा देव
परमेश्वर आहें; ज्या अमोरी लोकांच्या देशांत तुम्ही
राहतां त्यांच्या देवांचें भय तुम्ही बाळगूं नका; पण
तुम्हीं माझी वाणी ऐकली नाहीं.

११ मग परमेश्वराचा दूत अफ्रा येथें येऊन
योवाश अबियेजरी याच्या एला वृक्षाखालीं बसला; त्या
प्रसंगीं त्याचा पुत्र गिदोन मिद्यान्यांपासून बचाव व्हावा
म्हणून द्राक्षकुंडांत गव्हांची मळणी करीत होता,
१२ त्यास परमेश्वराच्या दूतानें दर्शन देऊन म्हटलें,
हे बलवान् वीरा, परमेश्वर तुझ्याबरोबर आहे.
१३ गिदोन त्यास म्हणाला, माझ्या प्रभू, परमेश्वर
आमच्याबरोबर असून आम्हांवर ही सर्व विपत्ति
येऊन कां पडावी ? परमेश्वरानें आम्हांस मिसरांतून
बाहेर आणिलें ना ? त्याच्या अद्भुत कृत्यांविषयीं आमचे
वाडवडील आम्हांस सांगत आले, तीं कृत्यें आतां कोठें
गेलीं ? परमेश्वरानें आतां आमचा त्याग करून आम्हांस
मिद्यान्यांच्या हातीं दिलें आहे. १४ तेव्हां परमेश्वरानें
त्याजकडे अवलोकन करून म्हटलें, तूं आपल्या ह्या
अंगबलाच्या जोरावर जा, आणि इस्राएल लोकांस
मिद्यानापासून सोडीव; मी तुला पाठवीत आहें ना ?
१५ तो त्यास म्हणाला, प्रभू, इस्राएलांस मी कसा
सोडविणार ? माझें कुळ मनश्शेवंशांत सर्वांत कनिष्ठ
आहे; तशांत मी आपल्या वडिलांच्या घराण्यांत अगदीं
कनिष्ठ आहें. १६ परमेश्वर त्याला म्हणाला, मी तुझ्या-
बरोबर राहीन; मिद्यानी लोकांचा संहार, जसा एका
पुरुषाचा करावा तसा, तूं करिशील. १७ तो त्यास
म्हणाला, तुझा मजवर प्रसाद झाला असल्यास तूंच मजशीं
बोलत आहेस याचें मला कांहीं चिन्ह दाखीव.
१८ मी आपलें अर्पण आणून तुजसमोर सादर करीपर्यंत
तूं येथून जाऊं नको. तो म्हणाला, तूं परत येईपर्यंत
मी येथेंच राहीन. १९ गिदोनानें आंत जाऊन एक
करडूं सिद्ध केलें व एफाभर सपिठाच्या बेखमीर भाकरी
केल्या; त्यानें मांस टोपलींत घालून आणि रसा बहु-
गुण्यांत घालून तें सगळें त्या एला वृक्षाखालीं आणून
सादर केलें. २० तेव्हां देवाचा दूत त्यास म्हणाला,
मांस व बेखमीर भाकरी घेऊन या खडकावर ठेव व
त्यावर रसा ओत; त्याप्रमाणें त्यानें केलें. २१ मग
परमेश्वराच्या दूतानें आपल्या हातांतल्या काठीच्या
टोकानें त्या मांसास व बेखमीर भाकरीस स्पर्श केला
तेव्हां खडकांतून अग्नि निघाला, आणि त्यानें तें
मांस व बेखमीर भाकरी भस्म केल्या; यानंतर
परमेश्वराचा दूत त्याच्यापुढून अंतर्धान पावला.
२२ हा परमेश्वराचा दूत होता हें गिदोनाच्या लक्षांत
आलें तेव्हां तो म्हणाला, हाय, हाय, हे प्रभू देवा !
परमेश्वराचा दूत मीं प्रत्यक्ष पाहिला. २३ परमेश्वर
त्यास म्हणाला, तुझें क्षेम असो; भिऊं नको, तूं
मरावयाचा नाहींस. २४ मग गिदोनानें तेथें परमेश्वरा-
प्रीत्यर्थ वेदी बांधिली व तिचें नांव याव्हे-शालोम
( परमेश्वर क्षेमदाता आहे ) असें ठेविलें; अबियेजेर-
करांच्या अफ्रा नामक गांवीं ती वेदी आजपर्यंत आहे.
२५ मग त्याच रात्रीं परमेश्वरानें गिदोनास म्हटलें,
आपल्या बापाचा गोऱ्हा म्हणजे दुसरा गोऱ्हा

सात वर्षांचा आहे तो घे, तुझ्या बापाची बालमूर्तीची
जी वेदी आहे ती व तिच्यापाशीं असलेली अशेरा
मूर्ति फोडून टाक; २६ मग विहित केलेल्या पद्धती-
प्रमाणें त्या खडकाच्या उच्चभागीं आपला देव परमेश्वर
याजसाठीं वेदी बांध आणि तीवर तूं फोडिलेल्या अशेरा
मूर्तीचीं लाकडें जाळून त्यांत त्या दुसऱ्या गोऱ्ह्याचें
हवन कर. २७ गिदोनानें आपल्याबरोबर आपले दहा
नौकर घेऊन परमेश्वराच्या वचनाप्रमाणें केलें, पण
आपल्या पित्याचें घराणें व नगरचे लोक यांच्या
भीतीनें तें काम त्याला दिवसां करितां आलें नाहीं,
म्हणून त्यानें तें रात्रीचें केलें. २८ नगरवासी
पहाटेस उठून पाहतात तों बालाची वेदी मोडून पडली
आहे आणि तिच्यापाशीं अशेरा मूर्ति भंगून पडली
आहे आणि तो दुसरा गोऱ्हा त्या नवीन बांधिलेल्या
वेदीवर अर्पिला आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें.
२९ ते एकमेकांशीं म्हणूं लागले, हें काम कोणीं केलें
असावें? त्यांनीं पुसतपास व बारीक शोध केल्यावर
म्हटलें, हें काम योवाशाचा पुत्र गिदोन याचेंच आहे.
३० तेव्हां नगरवासी लोक योवाशास म्हणूं लागले, तूं
आपल्या पुत्रास बाहेर आण; त्यास मारून टाकावयाचें
आहे; कारण त्यानें बालाची वेदी फोडून टाकिली आहे
आणि त्याजवळच्या अशेरा मूर्तीचा भंग केला आहे.
३१ तेव्हां योवाश आपणावर उठलेल्या त्या सर्वांस
म्हणाला, तुम्ही बालचा कैवार घेतां काय? तुम्ही
त्याचा बचाव करूं पाहतां काय? त्याचा जो कोणी
कैवार घेईल त्याचा आज सकाळ उलटण्यापूर्वीच वध
होवो; तो जर देव असला तर ज्यानें त्याची वेदी मोडून
टाकिली त्याच्याविरुद्ध त्यानें स्वतांचा कैवार घ्यावा;
३२ म्हणून त्या दिवशीं त्यानें गिदोनाचें नांव यरुब्बाल
(बालानें स्वतांच कैवार घ्यावा) असें ठेविलें. तो
म्हणाला, त्यानें बालाची वेदी मोडून टाकिली आहे
तर खुद्द बालानें त्याच्याविरुद्ध कैफियत करावी.

३३ सर्व मिद्यानी, अमालेकी व पूर्वदेशस्थ लोक
एकत्र मिळून नदीपार गेले व त्यांनीं इस्रेलाच्या
सपाटीवर तळ दिला. ३४ मग परमेश्वराचा आत्मा
गिदोनाच्या ठायीं आल्यावर त्यानें रणशिंग वाजविलें व
अबियेजरी त्याच्या पक्षास जमा झाले; ३५ आणि त्यानें
मनश्शांत सर्वत्र जासूद पाठविले, व तेथले लोकहि त्याला
येऊन मिळाले; त्याप्रमाणेंच त्यानें आशेर, जबुलून व
नफताली यांच्याकडे जासूद पाठविले, आणि तेहि त्याला
येऊन मिळावयास निघाले. ३६ गिदोन देवास म्हणाला,
तूं आपल्या वचनाप्रमाणें माझ्या हस्तें इस्राएलाचा
उद्धार करणार असलास, ३७ तर पाहा, मी या खळ्यांत
थोडीशी कातरलेली लोकर ठेवितों, रात्रीं तिच्यावर
तेवढें दहिंवर पडून आसपासची सर्व जमीन कोरडी
राहिली तर तुझ्या वचनाप्रमाणें तूं इस्राएलाचा माझ्या
हस्तें उद्धार करणार हें मला कळून येईल. ३८ तसाच
प्रकार घडून आला; त्यानें पहाटेस उठून ती लोकर दाबून
तींतलें दहिंवर पिळून एक वाटीभर पाणी काढिलें.
३९ मग गिदोन देवाला म्हणाला, तूं मजवर कोपणार
नाहींस तर मी आणखी एक वेळ बोलतों; या लोकरीच्या
द्वारें पुन्हा एक वेळ मी प्रतीति पाहतों; ही लोकर
तेवढी कोरडी राहून बाकी अवघ्या जमिनीवर दहिंवर
पडेल असें कर. ४० त्या रात्रीं देवानें तसेंच केलें;
म्हणजे ती लोकर मात्र कोरडी राहिली व बाकीच्या
सगळ्या जमिनीवर दहिंवर पडलें.

७ १ मग यरुब्बाल म्हणजे गिदोन आणि त्याच्या-
बरोबरचे सर्व लोक यांनीं पहाटेस उठून हरोद
झऱ्यानजीक तळ दिला; मिद्यानाची छावणी त्यांच्या
उत्तरेस मोरे नामक पहाडाजवळील खोऱ्यांत होती.

२ परमेश्वर गिदोनास म्हणाला, तुजबरोबर जे
लोक आहेत ते संख्येनें पुष्कळ आहेत, तेवढ्यांच्या
हातीं मी मिद्यान्यांस द्यावें असें मला वाटत नाहीं; दिलें
तर इस्राएल मजपुढें फुशारकी मिरवून म्हणेल कीं
माझ्या भुजबलानें माझा बचाव झाला. ३ तर जालेल
लोकांच्या कानीं जाईसें जाहीर कर कीं जर कोणी
भित्रा अथवा घाबरट असेल तर त्यानें गिलाद पर्वता-
वरून निघून परत जावें. तेव्हां बावीस हजार लोक
परत गेले आणि दहा हजार राहिले.

४ मग परमेश्वर गिदोनास म्हणाला, अजूनहि

लोक फार आहेत; त्यांस पाण्याजवळ घेऊन चल, तेथें
मी तुझ्यासाठीं त्यांस पारखीन. मी तुला सांगेन कीं
अमक्यानें तुझ्याबरोबर जावें तर त्यानें जावें; आणि
अमक्यानें तुझ्याबरोबर जाऊं नये तर त्यानें जातां
कामा नये. ५ त्याप्रमाणें त्यानें लोकांस पाण्यापाशीं
नेलें तेव्हां परमेश्वर गिदोनास म्हणाला, कुत्रा जिभेनें
पाणी चाटून पितो त्याप्रमाणें जो पिईल त्यास बाजूला
काढ, तसेंच गुडघे टेकून जो पिईल त्यास बाजूला
काढ. ६ जे तोंडाशीं हात नेऊन पाणी चाटून प्याले
ते तीनशें भरले, वरकड लोक गुडघे टेकून पाणी प्याले.
७ तेव्हां परमेश्वरानें गिदोनास सांगितलें, चाटून पाणी
पिणाऱ्या या तीनशें लोकांच्या हातून मी तुमचा बचाव
करीन आणि मिद्यान्यांस तुझ्या हातीं देईन; वरकड सगळ्या
लोकांनीं आपआपल्या ठिकाणीं जावें. ८ मग त्या
लोकांनीं अन्नसामग्री व रणशिंगें हातीं घेतलीं; त्यानें
वरकड सर्व इस्राएल लोकांस आपआपल्या डेऱ्याकडे
लावून दिलें, त्या तीनशें लोकांस मात्र राखून ठेविलें;
मिद्यानाची छावणी त्याच्याखालीं खोऱ्यांत होती.

९ त्याच रात्रीं परमेश्वरानें त्यास सांगितलें, ऊठ,
खालीं उतर, त्या छावणीवर चाल कर, मीं ती तुझ्या
हातीं दिली आहे. १० तुला खालीं उतरण्यास भीति
वाटत असली तर आपला सेवक पुरा यास बरोबर
घेऊन छावणीकडे जा; ११ आणि लोक काय म्हणतात
तें ऐक; म्हणजे तुला त्या छावणीवर चाल करण्यास
हिंमत येईल. मग तो आपला सेवक पुरा यास बरोबर
घेऊन छावणीच्या अगदीं बाहेरल्या अंगीं हत्यारबंद
लोक होते त्यांच्याजवळ गेला. १२ मिद्यानी, अमा-
लेकी व पूर्वदेशस्थ लोक टोळांप्रमाणें अगणित असून
त्या खोऱ्यांत पसरले होते; त्यांचे उंट समुद्रतीरींच्या
वाळूप्रमाणें अगणित होते. १३ गिदोन तेथें गेला
तेव्हां एक जण आपल्या सोबत्यास आपलें स्वप्न सांगत
होता; तो म्हणाला, ऐक, मीं स्वप्न पाहिलें कीं सातूची
एक भाकर लोटत लोटत मिद्यानाच्या छावणींत
गेली व तिनें डेऱ्यास असा धक्का दिला कीं तो पडला;
तिनें तो उलथून टाकिला व तो तसाच पडलेला राहिला.
१४ त्याच्या सोबत्यानें उत्तर दिलें, योवाशाचा पुत्र
गिदोन या इस्राएली पुरुषाची ही तरवार होय, दुसरें
कांहीं नव्हे; त्याच्या हातीं देवानें मिद्यान व त्याचें
सर्व सैन्य दिलें आहे.

१५ गिदोनानें तें स्वप्न व त्याचा अर्थ ऐकून दंडवत
घातलें; मग तो इस्राएलाच्या छावणींत परत येऊन
म्हणाला, ऊठा, परमेश्वरानें मिद्यानाचें सैन्य तुमच्या
हातीं दिलें आहे. १६ त्यानें त्या तीनशें पुरुषांच्या
तीन तुकड्या केल्या; त्या सर्वांच्या हातीं त्यानें रणशिंगें
व रिकामे घडे दिले; त्या घड्यांच्या आंत दिवट्या
ठेविल्या. १७ तो त्यांस म्हणाला, माझ्याकडे पाहा,
आणि मी करितों तसें करा; त्या छावणीच्या बाहेरल्या
अंगाशीं आपण जाऊन पोहंचलों म्हणजे जसें मी करीन
तसें करा. १८ मी व माझ्याबरोबरचे सर्व जण रण-
शिंगें फुंकूं तेव्हां तुम्हीहि छावणीच्या चारी दिशांस
रणशिंगें फुंका आणि म्हणा, परमेश्वराचा जय,
गिदोनाचा जय.

१९ मधल्या प्रहराच्या आरंभीं पहारा नुकताच
बदलला तेव्हां गिदोन आपल्याबरोबरच्या शंभर
पुरुषांसह छावणीच्या बाहेरल्या अंगीं गेला; मग
त्यांनीं रणशिंगें फुंकून आपल्या हातांतले घडे फोडून
टाकिले. २० तेव्हां त्या तिन्ही तुकड्यांनीं रणशिंगें
फुंकून घडे फोडून टाकिले आणि आपल्या डाव्या हातीं
दिवट्या आणि उजव्या हातीं फुंकावयासाठीं रणशिंगें
घेऊन त्यांनीं परमेश्वराची तरवार, गिदोनाची तरवार,
असा घोष केला. २१ तेव्हां ते छावणीच्या सभोवार
आपआपल्या ठिकाणीं उभे राहिले व ती सर्व सेना
पळूं लागली; त्यांनीं रणघोष करून त्यांस पळविलें. २२
त्यांनीं तीं तीनशें रणशिंगें फुंकलीं, आणि परमेश्वरानें
प्रत्येक माणसाची तरवार त्याच्या सोबत्यावर व सर्व
सेनेवर चालविली, तेव्हां सेनेंतील लोक सरेरानजीकच्या
बेथ-शिट्टापर्यंत व टब्बाथानजीकच्या आबेल-महोलाच्या
सीमेपर्यंत पळून गेले. २३ तेव्हां इस्राएली पुरुषांनीं
नफताली, आशेर व सर्व मनश्शे या प्रांतांतून एकवट
होऊन मिद्यानाचा पाठलाग केला. २४ गिदोनानें एफ्रा-

इमाच्या सर्व डोंगराळ प्रदेशांत जासूद पाठवून
लोकांस सांगितलें कीं मिद्यानावर चाल करून या
आणि बेथ-बारापर्यंत यार्देन नदीचे उतार रोखून धरा;
त्याप्रमाणें एफ्राइमाच्या सगळ्या लोकांनीं एकवट होऊन
बेथ-बारापर्यंतचे उतार रोखून धरिले. २५ त्यांनीं
मिद्यानाचे ओरेब व जेब या नांवांचे दोन राजे पकडिले.
त्यांनीं ओरेबास ओरेबाच्या खडकावर जिवें मारिलें
आणि जेबास जेबाच्या द्राक्षाकुंडाजवळ जिवें मारिलें
आणि मिद्यानाचा पाठलाग केला; त्यांनीं ओरेब व
जेब यांचीं शिरें यार्देनपार गिदोनाकडे नेलीं.
१ तेव्हां एफ्राइमी पुरुष गिदोनास म्हणाले, तूं
८ आम्हांशीं असा कां वागलास? तूं मिद्यानाशीं
लढावयास गेलास तेव्हां आम्हांस कां बोलाविलें
नाहीं? यावरून ते त्याशीं हुज्जत घालूं लागले. २ तो
त्यांस म्हणाला, तुम्हीं केलें त्या मानानें पाहतां मीं
काय केलें? एफ्राइमाच्या द्राक्षांचा सरवा हा अबि-
येजेराच्या द्राक्षांच्या सबंध पिकापेक्षां बरा नाहीं काय?
३ मिद्यानाचे राजे ओरेब व जेब यांस देवानें तुमच्या
हातीं दिलें; तुम्हीं केलें त्या मानानें मला काय करितां
आलें? तो असें बोलला तेव्हां त्यांचा त्याजवरील राग
शांत झाला. ४ गिदोन व त्याच्याबरोबरचे तीनशें
पुरुष थकूनभागून गेले होते तरी ते तसेच पाठलाग
करीत यार्देनतीरीं येऊन पलीकडे गेले. ५ तेव्हां तो
सुक्कोथ येथल्या लोकांस म्हणाला, माझ्याबरोबरच्या
लोकांस भाकरी द्या, कारण ते थकून गेले आहेत
आणि मिद्यानाचे राजे जेबह व सल्मुन्ना यांचा मी
पाठलाग करीत आहें. ६ सुक्कोथाचे अधिपति म्हणाले,
जेबह व सल्मुन्ना यांचीं मणगटें तुझ्या हातीं आलीं
आहेत म्हणून का आम्हीं तुझ्या सैन्याला अन्न द्यावें?
७ तेव्हां गिदोन म्हणाला, परमेश्वर जेबह व सल्मुन्ना
यांस माझ्या हातीं देईल तेव्हां जंगलचे कांटे व
कांटेरीं यांनीं तुमची चामडी फाडीन. ८ तेथून तो
पनुएल येथें गेला; तेथल्या लोकांकडेहि त्यानें तीच
मागणी केली; तेव्हां सुक्कोथाच्या लोकांप्रमाणेंच
पनुएलच्या लोकांनींहि त्यास उत्तर दिलें. ९ तेव्हां तो
पनुएलच्या लोकांस म्हणाला, मी सुखरूप माघारीं
येईन तेव्हां हा बुरूज पाडून टाकीन.
१० जेबह व सल्मुन्ना हे कर्कोर येथें होते आणि
त्यांजबरोबर सुमारें पंधरा हजार सैन्य होतें; पूर्व-
देशस्थांच्या सैन्यापैकीं तेवढेंच उरलें होतें, कारण एक
लक्ष वीस हजार धारकरी पुरुष पतन पावले होते.
११ तेव्हां नोबह व यागबहा यांच्या पूर्वेस राहुट्यांत
राहणाऱ्या लोकांच्या वाटेनें वर जाऊन जी सेना निर्भय-
पणें राहिली होती तिचा गिदोनानें संहार केला. १२
जेबह व सल्मुन्ना हे पळाले व त्यानें त्यांचा पाठलाग
केला; त्यानें जेबह व सल्मुन्ना हे मिद्यानाचे दोन
राजे पकडिले आणि सर्व सैन्याची दाणादाण केली.
१३ योवाशाचा पुत्र गिदोन हा लढाईहून परत
हेरेस घाटावरून आला. १४ त्यानें सुक्कोथांतल्या एका
तरुण पुरुषास धरून विचारितां त्यानें सुक्कोथांतील
सत्याहत्तर अधिपति व वडील यांची यादी लिहून
दिली. १५ मग तो सुक्कोथांतील मनुष्यांकडे जाऊन
म्हणाला, तुम्हीं माझी थट्टा केली होती ना कीं जेबह
व सल्मुन्ना यांचीं मणगटें तुझ्या हातीं आहेत म्हणून
काय आम्हीं तुझ्या थकल्याभागल्या लोकांस अन्न
द्यावें तर हे पाहा जेबह व सल्मुन्ना. १६ मग
त्यानें त्या नगरच्या वडील लोकांस पकडून रानांतील
कांटे व कांटेरीं घेऊन त्या सुक्कोथाच्या पुरुषांस चांगली
समज दिली. १७ त्यानें पनुएलचा बुरूज मोडून
टाकिला व त्या नगरांतील लोकांचा संहार केला.
१८ मग त्यानें जेबह व सल्मुन्ना यांस विचारिलें, तुम्हीं
ताबोर येथें ज्या पुरुषांचा वध केला ते कसे काय
होते? त्यांनीं उत्तर दिलें, ते तुझ्यासारखेच होते; त्या
प्रत्येकाचें रूप राजकुमाराच्यासारखें होतें. १९ तेव्हां
तो म्हणाला, ते माझे भाऊ, माझे सहोदर होते;
परमेश्वराच्या जीविताची शपथ, तुम्हीं त्यांना जिवंत
ठेविलें असतें तर मी तुमचा वध न करितों. २० मग
तो आपला ज्येष्ठ पुत्र येथेर यास म्हणाला, ऊठ,
यांचा वध कर; पण त्या तरुण पुरुषानें आपली तरवार
उपसली नाहीं; कारण तो अद्यापि तरुण असल्यामुळें

घाबरला. २१ तेव्हां जेबह व सल्मुन्ना म्हणाले, तूंच
उठून आम्हांवर प्रहार कर, पुरुषालाच पुरुषाचें बळ
असतें. तेव्हां गिदोनानें उठून जेबह व सल्मुन्ना यांचा
वध केला, आणि त्यांच्या उंटांच्या गळ्यांतल्या
चंद्रकोरी त्यानें काढून घेतल्या.

२२ तेव्हां इस्राएली पुरुषांनीं गिदोनास म्हटलें, तुम्हीं
व तुमच्या पुत्रपौत्रांनींहि आम्हांवर प्रभुत्व चालवावें;
कारण तुम्हीं आम्हांस मिद्यानाच्या हातून सोडविलें आहे.
२३ गिदोन त्यांस म्हणाला, मी तुम्हांवर प्रभुत्व
चालविणार नाहीं; माझा पुत्रहि तुम्हांवर प्रभुत्व चाल-
विणार नाहीं; परमेश्वर तुम्हांवर प्रभुत्व चालवील.
२४ गिदोन त्यांस म्हणाला, मी तुम्हांपाशीं एक मागणी
करितों; तुम्हीं प्रत्येकानें आपआपल्या लुटींतलीं कुंडलें
तेवढीं मला द्यावीं. ते इश्माएली लोक असल्याकारणानें
त्यांच्या कानांत सोन्याचीं कुंडलें होतीं. २५ ते
म्हणाले, आम्हीं तीं मोठ्या खुषीनें देतों. तेव्हां त्यांनीं
वस्त्र पसरून त्यांत आपआपल्या लुटींतील कुंडलें
टाकिलीं. २६ त्यानें मागून घेतलेल्या सोन्याच्या
कुंडलांचें वजन एक हजार सातशें शेकेल भरलें.
याखेरीज चंद्रकोरी, लोलक, मिद्यानी राजांच्या अंगावरलीं
जांभळीं वस्त्रें व त्यांच्या उंटांच्या गळ्यांतील जंजिरी
वेगळ्याच होत्या. २७ गिदोनानें त्यांचें एक एफोद
करून आपलें नगर अफ्रा येथें ठेविलें; सर्व इस्राएल
लोक तेथें जाऊन व्यभिचारी मतीनें त्या एफोदाच्या
नादीं लागले; तें एफोद गिदोन व त्याचें घराणें यांस
पाशासारखें झालें. २८ या प्रकारें मिद्यानी इस्राएल
लोकांपुढें दबून गेले; त्यांनीं पुनः आपलें डोकें वर केलें
नाहीं. गिदोनाच्या हयातींत म्हणजे चाळीस वर्षें देशास
विसावा प्राप्त झाला.

२९ योवाशाचा पुत्र यरुब्बाल हा आपल्या घरीं
जाऊन राहिला. ३० गिदोनाच्या पोटीं सत्तर पुत्र
झाले; कारण त्याला बहुत स्त्रिया होत्या. ३१ शखेमांत
त्याची एक उपपत्नी होती, तिला त्याजपासून एक पुत्र
झाला, त्याचें नांव त्यानें अबीमलेख असें ठेविलें.
३२ योवाशाचा पुत्र गिदोन हा चांगला म्हातारा
होऊन मरण पावला, आणि अबियेजऱ्यांच्या अफ्रा
नामक गांवांत त्याचा बाप योवाश याच्या थडग्यांत
त्याला पुरिलें.

३३ गिदोन मरण पावतांच इस्राएल लोक पुनः
फिरले आणि व्यभिचारी मतीनें बाल देवांच्या मागें
लागले; त्यांनीं बाल-बरीथ यास आपला देव केलें.
३४ इस्राएल लोकांचा देव परमेश्वर यानें त्यांस चोहीं-
कडच्या सर्व शत्रूंच्या हातून सोडविलें होतें याचें
त्यांना स्मरण राहिलें नाहीं; ३५ आणि यरुब्बाल म्हणजे
गिदोन यानें इस्राएलावर जे उपकार केले होते ते न
स्मरून त्याच्या घराण्यावर त्यांनीं दयामाया केली नाहीं.

९ १ यरुब्बालाचा पुत्र अबीमलेख शखेमास
आपल्या मंडळीकडे, आपल्या आईच्या भाऊबंदां-
कडे जाऊन त्यांस व आपल्या आजोळच्या सर्व
माणसांस म्हणाला, २ शखेमच्या सर्व मनुष्यांस विचारा
कीं यरुब्बालाच्या सत्तर पुत्रांनीं तुम्हांवर प्रभुत्व चाल-
वावें कीं एकाच पुरुषानें चालवावें? यांपैकीं तुम्हांस
कोणतें बरें वाटतें? मी तुमच्या हाडामांसाचा आहें हें
लक्षांत ठेवा. ३ तेव्हां त्याच्या आईच्या भाऊबंदांनीं
त्याच्याविषयीं बोलून त्याचे शब्द शखेमकरांच्या
कानावर घातले; अबीमलेख हा आपला बांधव आहे
असा विचार करून त्यांचें मन त्याजकडे वळलें.
४ त्यांनीं अबीमलेखास बाल-बरीथच्या मंदिरांतून
सत्तर रुपये दिले; ह्या पैशांनीं त्यानें हलकट व लुच्च्या
लोकांचा परिवार जमविला; व ते त्याच्याबरोबर
चालावयास लागले. ५ मग त्यानें अफ्रा येथें आपल्या
बापाच्या घरीं जाऊन आपले भाऊ म्हणजे यरुब्बालाचे
सत्तर पुत्र यांची एकाच खडकावर कत्तल केली; तरी
यरुब्बालाचा कनिष्ठ पुत्र योथाम हा वांचला, कारण
तो लपून राहिला होता.

६ तेव्हां शखेमांतील सर्व लोक आणि बेथ-मिल्लो
येथील सर्व लोक एकत्र झाले, व त्यांनीं शखेमच्या
स्तंभाजवळील एका वृक्षापाशीं अबीमलेखास राजा
केलें. ७ हें वर्तमान ऐकून योथाम हा गरिज्जीम
डोंगराच्या शिखरावर उभा राहिला व उच्च स्वरानें

म्हणाला, शखेमकरहो, माझें ऐकून घ्या म्हणजे देव
तुमचें ऐकेल. ८ एके समयीं वृक्ष कोणास तरी
अभिषेक करून आपणावर राजा नेमावें म्हणून
निघाले असतां ते जैतून-वृक्षाकडे जाऊन म्हणाले, तूं
आम्हांवर राज्य कर. ९ जैतून-वृक्ष त्यांस म्हणाला,
जिच्या योगानें देवाचा व माणसाचा सन्मान होतो ती
माझी स्निग्धता देण्याचें सोडून इतर वृक्षांवर हालत-
डोलत राहूं काय? १० मग वृक्षांनीं अंजीर-वृक्षास
म्हटलें, चल, तूं आम्हांवर राज्य कर. ११ अंजीर-वृक्ष
त्यांस म्हणाला, मी आपलें माधुर्य व उत्तम फळें
देण्याचें सोडून इतर वृक्षांवर हालतडोलत राहूं काय?
१२ मग ते द्राक्षांच्या वेलाकडे जाऊन म्हणाले, चल,
तूं आम्हांवर राज्य कर. १३ द्राक्षांचा वेल त्यांस म्हणाला,
देव आणि मानव यांस संतुष्ट करणारा माझा रस
देण्याचें सोडून इतर वृक्षांवर हालतडोलत राहूं काय?
१४ मग ते सर्व वृक्ष कांटेझुडुपास म्हणाले, चल, तूं
आम्हांवर राज्य कर. १५ तें कांटेझुडप वृक्षांस
म्हणालें, तुम्ही खरोखर मला अभिषेक करून
आपणावर राजा नेमणार असलां तर येऊन माझ्या
छायेचा आश्रय घ्या, नाहीं तर कांटेझुडपांतून अग्नि
निघून तो लबानोनाचे गंधसरू भस्म करील.
१६ आतां तुम्हीं सात्विकतेनें, सरळपणें अबीमलेखास
राजा केलें असेल आणि यरुब्बाल व त्याचें घराणें
यांशीं भलेपणानें वागून त्याच्या सर्व उपकारांची
योग्य फेड केली असेल तर बरें; १७ माझ्या
बापानें तर तुम्हांसाठीं युद्ध केलें, आपला प्राण
संकटांत घातला आणि तुम्हांस मिद्यानाच्या हातून
सोडविलें; १८ पण तुम्हीं आज माझ्या बापाच्या
घराण्यावर उठून त्याच्या सत्तर पुत्रांची एकाच
खडकावर कत्तल केली, आणि त्याच्या दासीचा पुत्र
अबीमलेख हा तुमचा बांधव असल्यामुळें त्यास तुम्हीं
शखेमकरांचा राजा केलें आहे; १९ जर तुम्हीं आज
यरुब्बाल व त्याचें घराणें यांशीं सात्विकतेनें व सरळ-
पणें वर्तन केलें असेल तर अबीमलेखास्तव आनंद करा
व तोहि तुमच्यास्तव आनंद करो; २० नाहींतर
अबीमलेखांतून अग्नि निघून शखेमकर व बेथ-मिल्लो
यांस भस्म करो; आणि शखेमकर व बेथ-मिल्लो
यांच्यांतून अग्नि निघून अबीमलेखास भस्म करो.
२१ मग योथाम पळून जाऊन आपला भाऊ अबीम-
लेख याच्या भीतीनें बैर येथें राहिला.

२२ अबीमलेख इस्राएलाचा तीन वर्षें अधिपति
होता. २३ देवानें अबीमलेख व शखेमचे लोक यांच्या
दरम्यान वैमनस्य उत्पन्न करणारा दुरात्मा पाठविला
आणि शखेमचे लोक अबीमलेखाशीं कपटानें वागूं
लागले; २४ यरुब्बालाच्या सत्तर पुत्रांचा घात केल्याचें
फळ भोगावें आणि त्यांचा वध करणारा त्यांचा बंधु
अबीमलेख आणि जे त्यास त्याच्या बंधूंचा वध
करण्यास साहाय्य झाले ते शखेमचे लोक यांचें
त्या खुनाबद्दल पारिपत्य व्हावें म्हणून देवानें असें
केलें. २५ तेव्हां शखेमकरांनीं त्याला पकडावयासाठीं
डोंगराच्या माथ्यावर दबा धरून बसावयास लोक ठेविले;
त्या वाटेनें आल्यागेल्याला ते लुटीत. हें वर्तमान अबीम-
लेखाच्या कानीं आलें.

२६ या समयीं एबदाचा पुत्र गाल आपल्या भाऊ-
बंदांसह शखेमास आला आणि शखेमकरांनीं त्याजवर
भिस्त ठेविली. २७ त्यांनीं आपआपल्या शेतांत
जाऊन द्राक्षमळ्यांतील द्राक्षें खुडून व तुडवून त्यांचा
रस काढला आणि उत्सव केला, आणि आपल्या
देवाच्या मंदिरांत जाऊन खाणेंपिणें केलें व अबीम-
लेखास शाप दिला. २८ तेव्हां एबदाचा पुत्र गाल
म्हणाला, अबीमलेख कोण आणि शखेम कोण कीं आम्हीं
त्यांचे अंकित व्हावें? यरुब्बालाचा पुत्र ना तो? जबूल
हा त्याचा कारभारी ना? शखेमाचा बाप हमोर
याच्या कुळांतील लोकांचे अंकित व्हा; आम्हीं
अबीमलेखाचे अंकित कां व्हावें? २९ ही सर्व प्रजा
माझ्या सत्तेंत आली तर किती बरें! म्हणजे मी
अबीमलेखास घालवून देईन. तो अबीमलेखास
म्हणाला, आपलें सैन्य वाढवून बाहेर पड. ३० एबद-
पुत्र गाल याचे हे शब्द ऐकून नगराचा अधिपति जबूल
याला संताप आला. ३१ त्यानें गुप्तरूपें जासूद

पाठवून अबीमलेखास कळविलें कीं एबदाचा पुत्र गाल
व त्याचे भाऊबंद शखेमास येऊन या नगरच्या
लोकांस तुजविरुद्ध उठवीत आहेत; ३२ तर तूं
आपल्याबरोबरच्या लोकांसहित रात्रीचा उठून
मैदानांत दबा धरून बस; ३३ मग पहाटेस उठून
सूर्य उगवतांच या नगरावर स्वारी कर, आणि तो
आपल्या लोकांसह तुजशीं सामना करण्यास येईल
तेव्हां तुला साधेल तसें त्यांचें कर.

३४ अबीमलेख आपल्याबरोबरच्या सगळ्या लोकां-
सहवर्तमान रात्रीचा उठून चार टोळ्या करून शखेमा-
समोर दबा धरून बसला. ३५ इकडे यबदाचा पुत्र
गाल बाहेर पडून नगराच्या वेशींत उभा राहिला;
तेव्हां अबीमलेख व त्याच्याबरोबरचे लोक दबा
धरून बसले होते ते तेथून उठले. ३६ त्या लोकांस
पाहून गाल जबूलास म्हणाला, पाहा, डोंगरमाथ्यावरून
लोक उतरत आहेत. जबूल त्यास म्हणाला, ती
डोंगराची सावली दिसत आहे, ती तुला मनुष्यांसारखी
भासत आहे. ३७ गाल पुनः म्हणाला, लोक मधल्या
प्रदेशांतून उतरून येत आहेत; आणि एक टोळी
एलोन-मौननीमाच्या वाटेनें येत आहे. ३८ तेव्हां
जबूल त्यास म्हणाला, ज्या तोंडानें तूं म्हणत होतास
कीं अबीमलेख कोण आहे आणि आम्ही त्याचे अंकित
कां व्हावें, तें तुझें तोंड आतां कोठें गेलें? ज्यांस तूं
तुच्छ मानिलें तेच ना हे लोक? तर आतां बाहेर
पडून त्यांच्याशीं युद्ध कर. ३९ तेव्हां शखेमकरांपुढें
होऊन गाल अबीमलेखाशीं लढला. ४० अबीमलेख
त्याच्या पाठीस लागला, तेव्हां तो त्याच्यापुढून पळून
गेला; नगराच्या वेशीपर्यंत पोहंचतां पोहंचतां बरेच
लोक घायाळ होऊन पडले. ४१ मग अबीमलेख अरुमा
येथें जाऊन राहिला; आणि जबूलानें गाल व त्याचे
भाऊबंद यांस घालवून दिलें, त्यांस शखेमांत राहूं
दिलें नाहीं. ४२ दुसऱ्या दिवशीं लोक गांवाबाहेर
मैदानांत आल्याची बातमी अबीमलेखास लागली.
४३ आपल्या लोकांच्या तीन तुकड्या करून तो
मैदानांत दबा धरून बसला; आणि लोक नगरांतून
बाहेर निघत आहेत असें पाहून त्यानें उठून त्यांच्यावर
हल्ला केला आणि त्यांचा संहार केला. ४४ अबीम-
लेख व त्याच्याबरोबरच्या तुकड्या पुढें धावत जाऊन
नगराच्या वेशीपाशीं उभ्या राहिल्या आणि दुसऱ्या
दोन तुकड्यांनीं मैदानांत असलेल्या सगळ्या लोकांवर
हल्ला करून त्यांचा संहार केला. ४५ त्या दिवशीं
अबीमलेख दिवसभर त्या नगराशीं लढत राहिला;
तें घेऊन तेथल्या लोकांची त्यानें कत्तल उडविली;
आणि तें नगर जमीनदोस्त करून त्यावर मीठ पेरिलें.

४६ हें ऐकून शखेमाच्या गढींत राहणारे सगळे
लोक एल-बरीथच्या मंदिराच्या मनोऱ्यावर गेले.
४७ शखेमाच्या गढींतले सर्व लोक एकवट झाल्याची
बातमी अबीमलेखास मिळाली, ४८ तेव्हां तो आपल्या-
बरोबरच्या लोकांसह सल्मोन डोंगरावर गेला आणि
हातांत कुऱ्हाड घेऊन त्यानें झाडाची एक फांदी तोडिली
व ती उचलून आपल्या खांद्यावर ठेविली; आणि तो
आपल्याबरोबरच्या लोकांस म्हणाला, मी जसें
करितांना तुम्हीं पाहिलें तसेंच तुम्हीहि त्वरित करा.
४९ तेव्हां सर्व लोक एकेक फांदी तोडून घेऊन
अबीमलेखाच्या मागून गेले; आणि त्या फांद्या त्या
मनोऱ्याशीं रचून त्याला त्यांनीं आग लावून दिली;
तेव्हां शखेमाच्या गढींतील सुमारें हजार पुरुष व
स्त्रिया जळून मेल्या.

५० मग अबीमलेख तेबेसाकडे गेला; आणि
त्यासमोर तळ देऊन त्यानें तें हस्तगत केलें;
५१ पण त्या नगराच्या आंत एक मजबूत गढी होती,
तींत नगरांतले स्त्रीपुरुष मिळून सर्व लोक पळून गेले
आणि तिचा दरवाजा बंद करून घेऊन तिच्या सज्जावर
चढले. ५२ तेव्हां अबीमलेख त्या गढीपाशीं जाऊन लढूं
लागला व तिला आग लावावयासाठीं तिच्या अगदीं
दरवाजापाशीं गेला. ५३ तेव्हां एका स्त्रीनें जात्याची
वरची तळी अबीमलेखाच्या डोक्यावर टाकून त्याचा
कपाळमोक्ष केला. ५४ तेव्हां त्यानें मोठ्या घाईनें
आपल्या शस्त्रवाहक मुलास बोलावून म्हटलें, आपली
तरवार उपसून मला छाटून टाक; नाहींतर स्त्रीनें याला

वधिलें असें लोक म्हणतील; त्या मुलानें त्याला भोस-
कलें आणि तो मरण पावला. ५५ अबीमलेख मरण
पावला हें पाहून इस्राएली पुरुष आपआपल्या स्थळीं
निघून गेले. ५६ अबीमलेखानें आपल्या सत्तर भावांची
कत्तल करून आपल्या बापाशीं जें दुष्ट वर्तन केलें
त्याबद्दल देवानें त्याचें ह्या प्रकारें पारिपत्य केलें;
५७ त्याप्रमाणेंच शखेमकरांच्या सर्व दुष्टाईचा बदला
देवानें त्यांच्या माथीं लादिला; आणि यरुब्बालाचा पुत्र
योथाम यानें त्यांस दिलेला शाप पुरा झाला.

१० १ अबीमलेखानंतर इस्राएलाचा उद्धार कर-
ण्यास इस्साखार वंशांतील तोला बिन पुवा बिन
दोदो हा पुढें झाला; तो एफ्राइमाच्या डोंगराळ
प्रदेशांत शामीर येथें राहत असे. २ त्यानें तेवीस वर्षे
इस्राएलाचा न्यायइनसाफ केल्यावर तो मृत्यु पावला;
त्याला शामीर येथें मूठमाती दिली.

३ त्याच्यामागून गिलादी याईर हा पुढें आला; त्यानें
बावीस वर्षे इस्राएलाचा न्यायइनसाफ केला. ४ त्यास
तीस पुत्र होते, ते तीस ज्वान गाढवांवर स्वारी करीत;
त्यांचीं तीस नगरें होतीं, तीं गिलाद देशांत असून
त्यांस आजवर हव्वोथ-याईर म्हणतात. ५ याईर मरण
पावला व त्यास कामोन येथें मूठमाती दिली.

६ मग इस्राएल लोकांनीं पुनः परमेश्वराच्या दृष्टीनें
जें वाईट तें केलें; बालीम व अष्टारोथ यांची आणि
अराम, सीदोन, मवाब, अम्मोनी व पलिष्टी यांच्या देवांची
ते उपासना करूं लागले; त्यांनीं परमेश्वराला सोडिलें,
त्याची उपासना ते करीनात; ७ म्हणून परमेश्वराचा कोप
इस्राएलावर भडकला आणि त्यानें त्यांस पलिष्ट्यांच्या
व अम्मोन्यांच्या हातीं दिलें. ८ त्या वर्षापासून
त्यांनीं इस्राएल लोकांवर जाचजुलूम केला; यार्देनेच्या
पूर्वेस अमोऱ्यांच्या देशातील गिलाद येथें राहणाऱ्या
सर्व इस्राएल लोकांवर त्यांनीं अठरा वर्षे जुलूम केला.
९ अम्मोनी लोक यार्देन ओलांडून यहूदा, बन्यामीन व
एफ्राइमाचें घराणें यांच्याशीं लढण्यास येत असत; यामुळें
इस्राएल फार संकटांत येत. १० मग इस्राएल लोकांनीं
परमेश्वराचा धावा करून म्हटलें, आम्हीं आमच्या
देवाला सोडिलें आणि बालमूर्तींची सेवा केली हें
आम्हीं तुझ्याविरुद्ध पाप केलें आहे. ११ तेव्हां
परमेश्वर इस्राएल लोकांस म्हणाला, मीं तुम्हांस
मिसरी, अमोरी, अम्मोनी व पलिष्टी यांच्या हातून
सोडविलें नाहीं काय? १२ तसेंच सिदोनी, अमालेकी
व मावोनी यांनीं तुम्हांला गांजिलें तेव्हां तुम्हीं माझा
धावा केला, आणि मीं तुम्हांस त्यांच्या हातून सोडविलें.
१३ तरी तुम्हीं मला सोडिलें आणि अन्य देवांची
उपासना केली म्हणून मी इतःपर तुमचा बचाव
करणार नाहीं. १४ जे देव तुम्हीं स्वीकारिले आहेत
त्यांचा धावा करा; जा, तुमच्या विपत्कालीं त्यांनीं
तुम्हांस सोडवावें. १५ तेव्हां इस्राएल लोक परमेश्वरास
म्हणाले, आम्हीं पाप केलें आहे; तुला बरें दिसेल
तसें आमचें कर, मात्र आज आमचा बचाव कर,
एवढीच आमची विनवणी आहे. १६ मग ते
आपल्यापासून अन्य देव दूर करून परमेश्वराची सेवा
करूं लागले; इस्राएल लोकांची विपत्ति पाहून देवाच्या
मनास खेद झाला.

१७ मग अम्मोनी लोकांनीं एकवट होऊन गिलाद
येथें तळ दिला. इकडे इस्राएल लोकांनीं जमा होऊन
मिस्पा येथें तळ दिला. १८ गिलाद येथील सरदार
एकमेकांस म्हणाले, अम्मोनी लोकांशीं सामना आरंभ-
ण्यास कोणता पुरुष तयार आहे? तोच गिलाद येथील
सर्व रहिवाश्यांचा अधिपति होईल.

११ १ इफ्ताह गिलादी हा एक मोठा पराक्रमी
वीर होता; तो वेश्यापुत्र असून गिलादाच्या
पोटचा होता. २ गिलादाच्या स्त्रीलाहि आणखी
पुत्र झाले; हे तिचे पुत्र मोठे झाले तेव्हां त्यांनीं
इफ्ताहास हाकून दिलें. त्यांनीं त्यास म्हटलें, तूं परस्त्रीचा
पुत्र आहेस, म्हणून आमच्या पितृकुळांत तुला कांहीं
वतन मिळावयाचें नाहीं. ३ तेव्हां इफ्ताह आपल्या
बांधवांपासून पळून जाऊन टोब देशांत राहिला; तेथें
त्याला हलकट लोक जाऊन मिळाले आणि ते त्याच्या-
बरोबर चालावयाला लागले.

४ कांहीं दिवसांनीं अम्मोनी लोकांनीं इस्राएलाशीं

युद्ध केलें. ५ अम्मोनी लोक इस्राएलाशीं लढूं लागले
तेव्हां गिलाद येथील वडील जन इफ्ताहाला आणा-
वयास टोब देशीं गेले. ६ ते इफ्ताहास म्हणाले, चला,
आमचे नायक व्हा म्हणजे आम्ही अम्मोनी लोकांशीं
युद्ध करूं. ७ इफ्ताह गिलादाच्या वडील जनांस
म्हणाला, तुम्हीं माझा द्वेष करून मला आपल्या
पितृगृहांतून हाकून दिलें होतें ना? आणि आतां तुम्ही
संकटांत आहां म्हणून मजकडे आलां काय? ८ गिलादाचे
वडील जन इफ्ताहास म्हणाले म्हणूनच आम्ही आतां
तुमच्याकडे वळलों आहों; तुम्ही आम्हांबरोबर चला, आणि
अम्मोनी लोकांशीं युद्ध करा, म्हणजे तुम्ही आम्हां सर्व
गिलादकरांचे अधिपति व्हाल. ९ गिलादाच्या त्या
वडील जनांस इफ्ताह म्हणाला, अम्मोनी लोकांशीं युद्ध
करावयास तुम्हीं मला स्वदेशीं नेलें आणि परमेश्वरानें
त्यांस माझ्या हातीं दिलें तर मी तुमचा अधिपति
खरोखरच होईन काय? १० गिलादाचे वडील जन
इफ्ताहास म्हणाले, परमेश्वर तुमच्याआमच्यामध्यें साक्षी
आहे; तुम्ही म्हणतां तसें आम्ही अवश्य करूं. ११ मग
इफ्ताह गिलादाच्या वडील जनांबरोबर गेला; लोकांनीं
त्यास आपला प्रमुख, आपला नायक नेमिलें, तेव्हां
इफ्ताहानें आपलें सगळें म्हणणें मिस्पा येथें परमे-
श्वरासमक्ष बोलून दाखविलें.

१२ मग इफ्ताहानें अम्मोन्यांच्या राजाकडे
जासूद पाठवून कळविलें कीं तुझेंमाझें काय झालें
आहे कीं तूं माझ्या देशांत मजशीं लढावयास आला
आहेस? १३ अम्मोन्यांच्या राजानें इफ्ताहाच्या
जासुदांस म्हटलें, इस्राएल लोक मिसर देशाहून आले
तेव्हां आर्णोन नदीपासून याब्बोक व यार्देन ह्या नद्यां-
पर्यंत जो माझा देश होता तो त्यांनीं हिरावून घेतला,
तर आतां तो मुकाट्यानें परत द्या. १४ इफ्ताहानें
अम्मोन्यांच्या राजाकडे पुनः जासुदांच्या हातीं निरोप
पाठविला, तो असा: १५ इफ्ताह म्हणतो, इस्राएलानें
मवाबाचा देश घेतला नाहीं किंवा अम्मोनी लोकांचाहि
घेतला नाहीं, १६ तर ते मिसर देशाहून निघाले आणि
रानांतून कूच करून तांबड्या समुद्रावरून कादेश येथें
आले; १७ तेव्हां त्यांनीं जासुदांच्या हातीं अदोमच्या
राजास सांगून पाठविलें कीं आम्हांस तुझ्या देशांतून
जाऊं दे, पण तो ऐकेना. तसेंच त्यांनीं मवाबाच्या राजास
सांगून पाठविलें, पण तोहि ऐकेना; म्हणून इस्राएल
कादेश येथें वस्ती करून राहिले. १८ तेव्हां त्यांनीं
रानांतून फिरत फिरत अदोम व मवाब यांच्या देशांस
वळसा घालून मवाबाच्या पूर्वेकडून येऊन आर्णोन
नदीपलीकडे आपले डेरे दिले; ते मवाबाच्या हद्दीच्या
आंत गेले नाहींत; कारण मवाबाची सरहद्द आर्णोन
नदी होती. १९ मग हेशबोन एथें राहणारा अमोऱ्यांचा
राजा सीहोन याजकडे इस्राएलांनीं जासुदांच्या हातीं
सांगून पाठविलें कीं आम्हांला तुझ्या देशांतून
स्वस्थानीं जाऊं दे; २० पण सीहोनास इस्राएलाचा
भरंवसा न येऊन त्यानें त्यास आपल्या देशांतून जाऊं
दिलें नाहीं; उलट त्यानें आपले सर्व लोक जमवून
याहस येथें तळ देऊन इस्राएलाशीं युद्ध केलें.
२१ तेव्हां इस्राएलाचा देव परमेश्वर यानें सीहोन व
त्याचे सर्व लोक इस्राएलाच्या हातीं दिले व त्यांनीं
त्यांचा संहार केला; या प्रकारें त्या देशचे रहिवासी
अमोरी यांच्या सर्व मुलखाचा ताबा इस्राएलाकडे
आला. २२ अर्थात् आर्णोन नदीपासून यब्बोक नदी-
पर्यंत आणि रानापासून यार्देन नदीपर्यंत अमोऱ्यांचा
सर्व देश त्यांच्या ताब्यांत आला. २३ इस्राएलाचा
देव परमेश्वर यानें आपली प्रजा इस्राएल हिच्यापुढून
अमोऱ्यांस घालवून दिलें आहे; तर आतां तुझा या
प्रांतांवर काय ताबा पोंचतो? २४ तुझा देव कमोश
यानें तुला जें वतन दिलें आहे त्यावरच तूं ताबा
चालवूं नये काय? आमचा देव परमेश्वर यानें
आम्हांपुढून ज्या कोणास घालवून दिलें त्यांच्या सर्व
प्रांतांवर आमचा ताबा असावा. २५ मवाबाचा राजा
सिप्पोरपुत्र बालाक याच्याहून तूं श्रेष्ठ आहेस काय?
तो इस्राएल लोकांशीं कधीं भांडलातंडला काय?
२६ आज तीनशें वर्षें इस्राएल लोक हेशबोन व त्याचीं
खेडीपाडीं, अरोएर व त्याचीं खेडीपाडीं आणि आर्णोन-
तीरींचीं सर्व नगरें यांत वस्ती करून आहेत, तर

इतका काळ तुम्हीं तीं कां परत घेतलीं नाहींत? २७ मीं कांहीं तुझा अपराध केला नाहीं; तर मजशीं लढाव-यास तूं आलास हा तूं माझा अन्याय केला आहे; तर परमेश्वर न्यायाधीश आहे, तो इस्राएल लोक व अम्मोनी लोक यांचा आज न्याय करो. २८ इफ्ताहानें पाठविलेला हा निरोप अम्मोन्यांच्या राजानें जुमानिला नाहीं.

२९ मग परमेश्वराचा आत्मा इफ्ताहाच्या ठायीं संचरला; तो गिलाद व मनश्शे या प्रदेशांतून कूच करून गिलादी मिस्पा येथें आला आणि तेथून अम्मोनी लोक होते तेथें गेला. ३० इफ्ताहानें परमेश्वरास असा नवस केला कीं तूं खात्रीनें अम्मोनी लोकांस माझ्या हातीं देशील तर ३१ मी अम्मोनी लोकांकडून सुखरूपपणें परत येईन तेव्हां माझ्या घराच्या दारांतून जें कांहीं माझ्यासमोर येईल तें परमे-श्वराचें मानून मी त्याचें हवन करीन. ३२ मग अम्मोनी लोकांशीं युद्ध करावयास इफ्ताह त्यांजवर गेला आणि परमेश्वरानें त्यांस त्याच्या हातीं दिलें. ३३ अरोएरापासून मिन्नीथास जाईपर्यंत वीस नगरें लागतात तेथपर्यंत आणि आबेल-करामीमापर्यंत त्यानें त्यांची मोठी कत्तल उडविली. ह्याप्रमाणें इस्राएल लोकांपुढें अम्मोनी लोक जेर झाले.

३४ इफ्ताह मिस्पा येथें आपल्या घरीं आला तेव्हां त्याची कन्या डफ वाजविणारे व नाचणारे यांस घेऊन त्याला सामोरी आली; ती त्याची एकुलती एक कन्या होती; तिच्याखेरीज त्यास पुत्र अथवा कन्या नव्हती. ३५ तिला पाहतांच आपलीं वस्त्रें फाडून तो म्हणाला, हाय, हाय, माझ्या कन्ये, तूं मला दुःखानें व्याकुळ केलें आहे, तूंहि मला क्लेश देणाऱ्यांपैकीं एक आहेस; परमेश्वराकडे माझ्या तोंडचा शब्द गेला, मला आतां माघार घेतां येत नाहीं. ३६ ती त्यास म्हणाली, बाबा, परमेश्व-राकडे तुमच्या तोंडचा शब्द गेला आहे; तुमच्या तोंडांतून जो शब्द निघाला आहे त्याप्रमाणें माझें करा; कारण परमेश्वरानें तुमचे शत्रु जे अम्मोनी लोक त्यांचा सूड तुमच्याप्रीत्यर्थ घेतला आहे. ३७ आणखी ती आपल्या बापास म्हणाली, मात्र एवढेंच करा कीं दोन महिन्यांचा मला अवकाश द्या म्हणजे मी आपल्या सख्यांसहवर्तमान डोंगरावर फिरून माझ्या कौमार्याबद्दल शोक करीन. ३८ तो म्हणाला, बरें आहे. त्यानें तिला दोन महिने जाऊं दिलें; मग ती आपल्या सख्यांसह-वर्तमान डोंगरावर फिरून आपल्या कौमार्याबद्दल शोक करीत राहिली. ३९ दोन महिने झाल्यावर ती आपल्या बापाकडे परत आली; तेव्हां त्यानें जो नवस केला होता त्याप्रमाणें तिचें केलें; तिनें पुरुष पाहिला नव्हता. यावरून इस्राएल लोकांत अशी चाल पडली कीं ४० इस्राएली कन्यांनीं गिलादी इफ्ताह यांच्या कन्येचें माहात्म्य गाण्यासाठीं प्रतिवर्षी चार दिवस जात जावें.

१२ १ मग एफ्राइमी लोक जमा होऊन उत्तरेकडे जाऊन इफ्ताहास म्हणाले, तूं अम्मोन्यांशीं लढावयास गेलास तेव्हां तुझ्याबरोबर आम्हांस कां बोलाविलें नाहीं? आम्ही तुला तुझ्या घरासकट जाळून टाकणार. २ इफ्ताह त्यांस म्हणाला, माझे व माझ्या लोकांचे अम्मोनी लोकांशीं बखेडे होत असत त्या समयीं तुमची कुमक मागितली असतां तुम्हीं त्यांच्या हातून मला सोडविलें नाहीं. ३ तुम्ही सोडवीत नाहीं हें मीं पाहिलें तेव्हां मी हातावर शीर घेऊन अम्मोनी लोकांवर चालून गेलों आणि परमेश्वरानें त्यांस माझ्या हातीं दिलें; तर आतां तुम्ही मजशीं लढण्यास कां चालून आलां? ४ नंतर इफ्ताह यानें गिलादाचे सर्व लोक जमा करून एफ्राइमाशीं युद्ध केलें. गिलादाच्या लोकांनीं एफ्राइमाचा मोड केला; कारण ते म्हणाले होते, अहो गिलाद्यांनो, तुम्हीं जे एफ्राइम व मनश्शे यांच्या-मध्यें राहत आहां ते तुम्ही पळपुटये एफ्राइमी आहां. ५ गिलाद्यांनीं एफ्राइम्यांच्या पूर्वीच यार्देनेचे उतार रोखून धरिले; जेव्हां कोणी एफ्राइमी पळपुट्या त्यांस म्हणे, मला पार जाऊं द्या, तेव्हां गिलादी लोक त्यास म्हणत, तूं एफ्राइमी आहेस काय? त्यानें नाहीं असें उत्तर दिलें तर ६ ते त्याला म्हणत, शिब्बोलेथ हा शब्द म्हण; तेव्हां तो सिब्बोलेथ म्हणे; त्याला त्या शब्दाचा शुद्ध उच्चार करतां येत नसे; मग ते त्याला धरून यार्देनेच्या उतारापाशीं मारून टाकीत; त्या

प्रसंगीं एफ्राइमांतले बेचाळीस हजार लोक पडले.

७ इफ्ताहानें सहा वर्षें इस्राएल लोकांचा न्यायइन-
साफ केला. इफ्ताह गिलादी मरण पावला व त्यास
गिलादाच्या एका नगरांत मूठमाती दिली.

८ त्याच्यानंतर इब्सान बेथलहेमकर यानें इस्राएलाचा
न्यायइनसाफ केला. ९ त्याला तीस पुत्र होते; आणि त्यानें
आपल्या तीस कन्या परस्थळीं देऊन टाकिल्या; आणि
आपल्या पुत्रांसाठीं त्यानें परस्थळांतून तीस मुली
आणिल्या. त्यानें इस्राएलाचा सात वर्षें न्यायइनसाफ केला.
१० इब्सान मरण पावला व त्यास बेथलहेम येथें
मूठमाती दिली.

११ त्यानंतर जबुलूनी एलोन यानें इस्राएलाचा
न्यायइनसाफ केला; तो दहा वर्षें इस्राएलाचा शास्ता होता.
१२ जबुलूनी एलोन मृत्यु पावला, त्यास जबुलूनांतील
अयालोन येथें मूठमाती दिली.

१३ त्याच्यानंतर हिल्लेलाचा पुत्र अब्दोन पिराथोनी
इस्राएलाचा शास्ता झाला. १४ त्यास चाळीस पुत्र व
तीस नातू होते; ते सत्तर ज्वान गाढवांवर स्वारी
करीत. त्यानें इस्राएलाचा आठ वर्षें न्यायइनसाफ केला.
१५ मग हिल्लेलाचा पुत्र अब्दोन पिराथोनी हा मृत्यु
पावला, त्यास एफ्राईम प्रांतांतील अमालेक्यांच्या
डोंगराळ प्रदेशांत पिराथोन येथें मूठमाती दिली.

१३ १ इस्राएल लोकांनीं पुनः परमेश्वराच्या
दृष्टीनें जें वाईट तें केलें, तेव्हां परमेश्वरानें
त्यांस चाळीस वर्षें पलिष्ट्यांच्या हातीं दिलें.

२ त्या वेळीं सरा गांवीं दान कुळांतला एक पुरुष होता,
त्याचें नांव मानोहा; त्याची स्त्री वंध्या होती; तिला मूल-
बाळ झालें नाहीं. ३ परमेश्वराच्या दूतानें त्या स्त्रीस दर्शन
देऊन सांगितलें, पाहा, तूं वंध्या असून तुला कांहीं
मूलबाळ नाहीं, पण आतां तूं गर्भवती होऊन तुला
पुत्र होईल. ४ तर तूं सावध राहा आणि द्राक्षारस
किंवा मद्य पिऊं नको आणि अशुद्ध असें कांहीं खाऊं
नको; ५ पाहा, तूं गर्भवती होऊन तुला पुत्र होईल;
त्याच्या डोक्यावर वस्तरा फिरवूं नये; कारण गर्भावस्थे-
पासूनच तो मुलगा देवाचा नाजीर होईल आणि इस्रा-
एलास पलिष्ट्यांच्या हातून सोडवावयास तोच आरंभ
करील. ६ त्या स्त्रीनें येऊन आपल्या नवऱ्यास
सांगितलें, एक देवाचा मनुष्य मजकडे आला, त्याचें
स्वरूप देवाच्या दूताप्रमाणें अति भयानक होतें; पण तो
कोठून आला होता हें मीं त्यास विचारिलें नाहीं व
त्यानेंहि मला आपलें नांव सांगितलें नाहीं. ७ तो
मला म्हणाला, पाहा, तूं गर्भवती होऊन तुला पुत्र
होईल; यापुढें तूं द्राक्षारस किंवा मद्य पिऊं नको,
आणि अशुद्ध असें कांहीं खाऊं नको; कारण तो मुलगा
गर्भावस्थेपासून मरेपर्यंत देवाचा नाजीर राहील.
८ तेव्हां मानोहानें परमेश्वराची विनवणी करून म्हटलें,
हे प्रभू, मी तुला प्रार्थितों कीं तूं जो देवाचा
मनुष्य पाठविला होता त्यानें पुनः आम्हांकडे येऊन जो
बालक जन्मणार त्याचें आम्हीं काय करावें तें आम्हांस
शिकवावें असें कर. ९ देवानें मानोहाचें म्हणणें
ऐकलें; ती स्त्री शेतांत बसली असतां देवाचा दूत तिज-
कडे पुनः आला; पण तिचा नवरा मानोहा तिजबरोबर
नव्हता; १० म्हणून त्या स्त्रीनें त्वरेनें पळत जाऊन
आपल्या नवऱ्यास सांगितलें कीं त्या दिवशीं जो मनुष्य
आला होता त्यानें पुनः मला दर्शन दिलें आहे.
११ मानोहा उठून आपल्या स्त्रीच्या मागें गेला, आणि त्या
पुरुषाजवळ जाऊन त्यास त्यानें विचारिलें, या स्त्रीशीं आप-
णच बोलला होतां काय? तो म्हणाला, होय. १२ मानोहा
म्हणाला, आपल्या म्हणण्याप्रमाणें घडो; पण तो कोणत्या
प्रकारचा मुलगा व्हावयाचा व त्याचें काय काम अस-
णार? १३ परमेश्वराचा दूत मानोहास म्हणाला, जें
कांहीं मीं या स्त्रीस सांगितलें आहे त्या सगळ्यांस तिनें
जपावें. १४ द्राक्षवेलाचा कसलाहि उपज तिनें खाऊं नये;
तिनें द्राक्षारस किंवा मद्य पिऊं नये व कोणताहि
अशुद्ध पदार्थ खाऊं नये; मी जी आज्ञा तिला दिली
आहे ती सगळी तिनें पाळावी. १५ मानोहा परमे-
श्वराच्या दूतास म्हणाला, आमची अशी विनंति आहे कीं
आपण अमळ थांबावें म्हणजे आपणासाठीं आम्ही एक
करडूं सिद्ध करितों. १६ परमेश्वराचा दूत मानोहास म्हणाला,
तूं मला थांबविलें तरी मी तुझ्या हातचें अन्न खाणार नाहीं;

तूं होमबलि केला तरी तो परमेश्वरास केला पाहिजे.
तो परमेश्वराचा दूत होता हें मानोहास ठाऊक
नव्हतें. १७ मानोहा परमेश्वराच्या दूतास म्हणाला,
आपलें नांव काय ? आपल्या बोलण्याप्रमाणें घडून आलें
म्हणजे आम्ही आपलें गौरव करूं. १८ परमेश्वराचा दूत
त्याला म्हणाला, तूं माझें नांव कां पुसतोस ? तें अद्भुत
आहे. १९ तेव्हां मानोहानें एक करडूं अन्नबलि-
सहित खडकावर परमेश्वरास अर्पिलें; तेव्हां दूतानें
अद्भुत कृति केली ती मानोहा व त्याची बायको यांनीं
पाहिली. २० त्या वेदीवरून आकाशाकडे ज्वाला
उठत असतां परमेश्वराच्या दूतानें त्या वेदीवरल्या
ज्वालेंतून आरोहण केलें; तें पाहून मानोहा व त्याची
बायको यांनीं दंडवत घातलें. २१ परमेश्वराच्या दूतानें
पुनः मानोहास व त्याच्या स्त्रीस दर्शन दिलें नाहीं;
मग मानोहा समजला कीं हा परमेश्वराचा दूत आहे.
२२ मानोहा आपल्या स्त्रीस म्हणाला, आपण खास
मरणार, कारण आपण देवास पाहिलें; २३ पण
त्याची स्त्री त्याला म्हणाली, आपल्याला मारून टाकण्याची
परमेश्वराची इच्छा असती तर त्यानें आपल्या हातून
होमबलि व अन्नबलि स्वीकारिले नसते, आपणांला हें
सगळें दाखविलें नसतें, आणि या समयीं त्यानें ज्या
गोष्टी सांगितल्या तशा सांगितल्या नसत्या. २४ पुढें
त्या स्त्रीस पुत्र झाला; तिनें त्याचें नांव शमशोन ठेविलें;
तो मुलगा लहानाचा मोठा झाला व परमेश्वराचा
प्रसाद त्याजवर होता. २५ सरा व अष्टावोल यांच्या
दरम्यान महने-दान येथें ( दानांच्या छावणींत ) परमे-
श्वराच्या आत्म्याची त्याच्या ठायीं स्फूर्ति होऊं लागली.

१ शमशोन तिम्ना येथें गेला; तेथें त्यानें
१४ एक पलिष्टी स्त्री पाहिली. २ तेव्हां त्यानें
जाऊन आपल्या मातापितरांस सांगितलें कीं
तिम्ना येथें मीं एक पलिष्टी स्त्री पाहिली आहे; ती
मला बायको करून द्या. ३ तेव्हां त्याचीं मातापितरें
त्यास म्हणालीं, तुझ्या भाऊबंदांत, आमच्या सर्व
लोकांत कोणी स्त्री नाहीं कीं काय म्हणून तूं त्या
बेसुंनत पलिष्ट्यांतली बायको करूं पाहत आहेस ?
शमशोन आपल्या पित्यास म्हणाला, तीच मला
मिळवून द्या, तीच माझ्या मनास आली आहे.
४ पलिष्ट्यांशीं विरोध करण्याचें निमित्त मिळावें
म्हणून ही गोष्ट परमेश्वराकडूनच घडली आहे हें
त्याच्या मातापितरांस कळलें नाहीं. त्या काळीं
पलिष्ट्यांची सत्ता इस्राएलावर होती.
५ शमशोन आपल्या आईबापांसह तिम्ना येथें गेला;
तो तेथील द्राक्षांच्या मळ्यांपाशीं येऊन पोहंचला तों
त्याजसमोर एक तरुण सिंह येऊन गर्जूं लागला. ६ तेव्हां
परमेश्वराच्या आत्म्याची त्याच्या ठायीं प्रबळ स्फूर्ति झाली,
आणि त्यानें हातांत कांहीं नसतां करडूं फाडावें तसें
त्या सिंहास फाडून टाकिलें; तथापि आपण काय केलें
तें त्यानें आपल्या आईबापांस सांगितलें नाहीं. ७ मग
त्यानें जाऊन त्या स्त्रीशीं बोलणें केलें; ती शमशोनाला
फार आवडली. ८ कांहीं दिवसांनीं तो तिला आणण्या-
साठीं पुनरपि जात असतां आडवाट करून सिंहाचें
कलेवर पाहण्यास गेला तों त्या सिंहाच्या कलेवरांत
मधमाशांचा घोळका व मध हीं त्याच्या दृष्टीस पडलीं.
९ त्यांतला कांहीं मध हातांत घेऊन तो वाटेनें
खातखात गेला; आपल्या आईबापांकडे येऊन त्यानें
तो मध त्यांस दिला, आणि त्यांनींहि तो खाल्ला;
तथापि सिंहाच्या कलेवरांतून त्यानें तो मध आणिला
होता हें त्यांस त्यानें सांगितलें नाहीं. १० मग त्याचा
बाप त्या स्त्रीच्या घरीं गेला; आणि तेथें शमशोनानें
कुमारांच्या प्रघाताप्रमाणें मेजवानी दिली. ११ तेथल्या
लोकांनीं त्यास पाहून त्याच्याबरोबर राहावयास तीस
सोबती बोलावून आणिले. १२ शमशोन त्यांस म्हणाला,
मी तुम्हांस एक कोडें घालितों; मेजवानीच्या सात
दिवसांत तें उलगडून त्याचा अर्थ सांगाल तर मी
तुम्हांस तीस पासोड्या व तीस पोषाख देईन; १३ पण
तुम्हांस तें उलगडतां आलें नाहीं तर तुम्ही मला तीस
पासोड्या व तीस पोषाख द्यावे. त्यांनीं त्यास म्हटलें, तुझें
कोडें आम्हांस ऐकूं दे. १४ मग तो त्यांस म्हणाला

भक्षकांतून भक्ष्य
व उग्रांतून मधुर तें काय ?

तीन दिवसपर्यंत त्यांस या कोड्याचा अर्थ उलगडेना.
१५ सातव्या¹ दिवशीं ते शमशोनाच्या बायकोकडे जाऊन तिला म्हणाले, तूं आपल्या नवऱ्यास फुसलावून त्यास या कोड्याचा अर्थ सांगावयास लाव, नाहीं तर आम्ही तुला व तुझ्या बापाचें घर अग्नीनें जाळून टाकूं; तुम्हीं आम्हांस बुचाडून घेण्यास येथें बोलाविलें आहे, असेंच ना ?
१६ तेव्हां शमशोनाची बायको त्याच्यापुढें रडून म्हणाली, तुम्ही माझ्यावर प्रीति करीत नाहीं, तुम्ही माझा द्वेष करितां; तुम्हीं माझ्या जातीच्या लोकांस कोडें घातलें, पण मला त्याचा अर्थ सांगितला नाहीं. तो तिला म्हणाला, मीं तें माझ्या आईबापांस सांगितलें नाहीं, तर तें तुला कसें सांगूं ?
१७ मेजवानीच्या सातव्या दिवसापर्यंत ती त्याजसमोर रडत राहिली; सातव्या दिवशीं तिनें त्यास फारच आग्रह केला, तेव्हां त्यानें तिला तें सांगितलें; मग तिनें तें कोडें आपल्या लोकांस उलगडून सांगितलें.
१८ सातव्या दिवशीं सूर्यास्तापूर्वी नगरवासी लोक त्यास म्हणाले, मधापेक्षां गोड तें काय ? आणि सिंहापेक्षां उग्र तें काय ? तेव्हां तो त्यांस म्हणाला,

तुम्हीं माझ्या कालवडीस नांगरास जुंपिलें नसतें
तर तुम्हांस माझें कोडें कधीं न उलगडतें.

१९ मग परमेश्वराच्या आत्म्याची त्याच्या ठायीं प्रबल स्फूर्ति होऊन तो अष्कलोनास गेला; तेथलीं तीस माणसें मारून त्यांचीं वस्त्रें त्यानें काढून घेतलीं, आणि ज्यांनीं कोडें उलगडिलें होतें त्यांस त्यांतून पोषाख दिले. मग तो संतप्त होऊन आपल्या बापाच्या घरीं गेला.
२० इकडे शमशोन ज्या एका सोबत्याशीं मित्रभावानें वागला होता त्यास त्याची बायको देण्यांत आली.

**१५** १ कांहीं दिवसांनीं गहूं कापण्याच्या हंगामांत शमशोन एक करडूं घेऊन आपल्या बायकोच्या भेटीस गेला; तो म्हणाला, मी खोलींत आपल्या बायकोकडे जातों; पण त्याच्या सासऱ्यानें त्याला आंत जाऊं दिलें नाहीं.
२ त्याचा सासरा म्हणाला, तूं तिचा पराकाष्ठेचा द्वेष करितोस असें खरोखर मला वाटून मीं ती तुझ्या सोबत्यास दिली; तिची धाकटी बहीण तिच्याहून सुंदर आहे ना ? तर तिच्याऐवजीं ती घे.
३ शमशोन त्या लोकांस म्हणाला, या खेपेस मीं पलिष्ट्यांचें वाईट केलें तर त्यांस मला दोष लावितां येणार नाहीं.
४ मग शमशोनानें जाऊन तीनशें कोल्हे धरिले, मशाली मिळविल्या, व त्या कोल्ह्यांच्या शेपटास शेपूट गुंतवून दोनदोन शेपटांच्यामध्यें एकएक मशाल बांधिली.
५ मग त्यानें त्या मशाली पेटवून पलिष्ट्यांच्या उभ्या पिकांत त्या कोल्ह्यांस सोडिलें, तेव्हां धान्याच्या सुड्या, उभें पीक व जैतूनांचे मळे जळून गेले.
६ पलिष्टी लोक विचारूं लागले, हें कोणीं केलें ? तेव्हां लोकांनीं म्हटलें, तिम्नाकराचा जांवई शमशोन यानें हें काम केलें, कारण त्याच्या सासऱ्यानें त्याची स्त्री त्याच्या सोबत्यास दिली आहे. तेव्हां पलिष्ट्यांनीं येऊन तिला व तिच्या बापास अग्नीनें जाळून टाकिलें.
७ मग शमशोन त्यांस म्हणाला, तुम्हीं असलें काम केलें म्हणून मी तुमचा सूड घेईन तेव्हां स्वस्थ होईन.
८ त्यानें त्यांस खरपूस मार देऊन त्यांचा सप्पा उडविला; मग तो एटाम खडकाच्या दरींत जाऊन राहिला.

९ नंतर पलिष्टी लोकांनीं चढाई केली व यहूदांत तळ देऊन ते लेहींत पसरले,
१० तेव्हां यहूदी लोकांनीं त्यांस विचारिलें, तुम्ही आम्हांवर कां चालून आलां ? ते म्हणाले, शमशोनास बांधून नेण्यास आलों आहों; त्यानें आमचें केलें तसेंच आम्ही त्याचें करणार.
११ तेव्हां यहूदांतले तीन हजार पुरुष एटाम खडकाच्या दरींत जाऊन शमशोनास म्हणाले, पलिष्ट्यांची आम्हांवर सत्ता आहे हें तुला ठाऊक नाहीं काय ? तूं आम्हांवर हें काय संकट आणिलें ? तो त्यांस म्हणाला, त्यांनीं माझें केलें तसेंच मींहि त्यांचें केलें.
१२ ते शमशोनास म्हणाले, तुला पलिष्ट्यांच्या हवालीं करावें म्हणून आम्ही आलों आहों. शमशोन त्यांस म्हणाला, तुम्ही स्वतः माझ्यावर तुटून पडणार नाहीं अशी शपथ वाहा.
१३ ते म्हणाले नाहीं, नाहीं; आम्ही

¹ पाठभेद : चवथ्या

केवळ तुला घट्ट बांधून त्यांच्या हवाली करणार;
आम्ही तुला खरोखर मारणार नाहीं. मग त्यांनीं
त्याला दोन नव्या दोरांनीं बांधून खडकांतून वर
आणिलें. १४ तो लेहीपर्यंत येऊन पोहंचला तेव्हां
पलिष्टी त्यास पाहून जयघोष करूं लागले; तेव्हां
परमेश्वराच्या आत्म्याची त्याच्या ठायीं प्रबल स्फूर्ति
होऊन त्याच्या भुजांस बांधिलेले दोर अग्नीनें जळलेल्या
सणासारखे झाले, आणि त्याच्या हातांचीं बंधनें गळून
पडलीं. १५ मग गाढवाचें एक नवें जाभाड त्यास दिसलें,
तें हातीं घेऊन त्यानें एक हजार मनुष्यांस मारून टाकिलें.
१६ शमशोन म्हणाला,

गाढवाच्या जाभाडानें मीं राशीच्या राशी
पाडिल्या;

गाढवाच्या जाभाडानें मीं हजार मनुष्यें वधिलीं.
१७ हें आपलें बोलणें संपविल्यावर त्यानें आपल्या
हातांतलें तें जाभाड टाकून दिलें व त्या ठिकाणाचें नांव
त्यानें रामथ-लेही ( जाभाडाची टेकडी ) असें ठेविलें.
१८ नंतर त्यास फार तहान लागली, आणि तो पर-
मेश्वराचा धावा करून म्हणाला, तूं आपल्या दासाच्या
हस्तें ही मोठी सोडवणूक करविली खरी, पण मी
आतां तहानेनें मरून बेसुनत लोकांच्या हातीं पडत
आहें. १९ तेव्हां परमेश्वरानें लेहींत खळगा फोडून एक
खळगा केला, त्यांतून पाणी वाहूं लागलें; तें पाणी
पिऊन त्याच्या जिवांत जीव आला व तो ताजातवाना
झाला; यावरून त्या झऱ्याचें नांव एन-हक्कोरे ( धावा
करणाऱ्याचा झरा ) असें पडलें; तो झरा अद्यापि
लेहींत आहे. २० पलिष्ट्यांच्या अमदानींत वीस वर्षें
त्यानें इस्राएलांचा न्यायइनसाफ केला.

१६ १ मग शमशोन गज्जा येथें गेला; तेथें
एक वेश्या त्यानें पाहिली व तिजपाशीं तो
गेला. २ शमशोन तेथें आला ही बातमी
गज्जकरांस लागली तेव्हां त्यांनीं त्यास वेढिलें
आणि त्याचा घात करण्यासाठीं नगराच्या वेशींत ते
रात्रभर दबा धरून राहिले; सकाळीं उजाडेपर्यंत त्यास
जिवें मारूं असें म्हणून ते रात्रभर गुपचूप राहिले.
३ इकडे शमशोन मध्यरात्रपर्यंत पडून राहिला व
मध्यरात्रीं उठून त्यानें नगराच्या वेशीचीं कवाडें
आणि दोन्ही दारबाह्या हीं धरून अडसरांसहित
उखळून खांद्यावर घेऊन हेब्रोनासमोरील डोंगराच्या
शिखरावर नेलीं.

४ नंतर सोरेक खोऱ्यांतील दलीला नांवाच्या एका
स्त्रीवर त्याचें मन बसलें. ५ तेव्हां पलिष्ट्यांचे सरदार
त्या स्त्रीकडे जाऊन तिला म्हणाले, तूं त्यास फुसलावून
त्याच्याकडून एवढें काढून घे कीं त्याचें प्रचंड बळ कशांत
आहे, आणि कोणत्या उपायानें आम्ही त्याहून वरचढ
होऊं व त्याच्या मुसक्या बांधून त्यास जेर करूं; आम्ही
तुला प्रत्येकीं अकराशें रुपये देऊं. ६ दलीला शमशोनास
म्हणाली, तुमचें प्रचंड बळ कशांत आहे व कोणत्या
रीतीनें तुम्हाला बांधून जेर करितां येईल तें मला सांगा.
७ शमशोन तिला म्हणाला, सुकविलेल्या नाहींत अशा
सात ताज्या फोकांनीं मला बांधून टाकिलें तर मी
बलहीन होऊन इतर माणसांसारखा होईन. ८ मग
सुकविलेले नाहींत असे सात ताजे फोक घेऊन पलिष्ट्यांचे
सरदार तिच्याकडे आले; आणि तिनें शमशोनास
त्या फोकांनीं बांधिलें. ९ त्या वेळीं आंतल्या खोलींत
कांहीं लोक तिनें छपवून ठेविले होते. ती त्यास म्हणाली,
शमशोना, पलिष्टी तुम्हावर चालून आले आहेत. तेव्हां
सणाचें सूत आगीचा वास लागतांच जसें जळून
जातें तसें त्यानें ते फोक तोडून टाकिले. त्याच्या
बळाचा थांग कांहीं लागलाच नाहीं. १० दलीला
शमशोनास म्हणाली, तुम्हीं मला खोटें सांगून माझी
वंचना केली; तुम्ही कशानें बद्ध व्हाल हें मला आतां
खरें खरें सांगा. ११ तो तिला म्हणाला, कामास न
लाविलेल्या अशा नव्या दोरांनीं मला कसून बांधिलें
तर मी बलहीन होऊन इतर माणसांसारखा होईन.
१२ दलीला नवे दोर आणून त्यास बांधून म्हणाली,
शमशोना, पलिष्टी तुम्हावर चालून आले आहेत. त्याच्या-
साठीं टपलेले लोक आंतल्या खोलींत बसले होते. तेव्हां
धागा तोडावा तसे त्यानें ते आपल्या हातांचे दोर तोडून
टाकिले. १३ दलीला शमशोनास म्हणाली, तुम्ही आतां-

पर्यंत खोटें सांगून माझी वंचना केली तर तुम्ही कशानें
बद्ध व्हाल तें मला सांगा. तो तिला म्हणाला, माझ्या
केसाच्या सात बटा मागाच्या ताण्यांत गुंफिल्या
तर मी बद्ध होईन. १४ मग तिनें त्याचे केस मागाच्या
फणीवर ताणून बांधिले व ती त्यास म्हणाली, शमशोना,
पलिष्टी तुम्हावर चालून आले आहेत. तेव्हां त्यानें झोपें-
तून जागें होऊन ती मागाची फणी व ताणा उखळून
काढिला. १५ मग दलीला त्यास म्हणाली, तुमचें मन
कांहीं मजवर नाहीं, तर तुझ्यावर माझी प्रीति आहे
असें कसें म्हणतां? तुम्ही माझी ह्यासुद्धां तीन वेळां वंचना
केली; तुमचें प्रचंड बळ कशांत आहे तें तुम्हीं मला सांगि-
तलें नाहीं. १६ तिनें दररोज बोलून बोलून त्याच्यापाशीं
जिकीर केल्यामुळें त्याला जीव नकोसा झाला. १७ मग
त्यानें आपलें ह्रद्गत तिला सांगितलें; तो तिला म्हणाला,
माझ्या डोक्यास कधीं वस्तरा लागला नाहीं, कारण मी
आपल्या मातेच्या उदरीं होतों तेव्हांपासून देवाचा
नाजीर आहें; माझें मुंडण झाल्यास माझें बळ जाईल व मी
बलहीन होऊन इतर माणसांसारखा होईन. १८ त्यानें
आपलें सारें ह्रद्गत सांगितलें हें पाहून दलीलेनें
पलिष्ट्यांच्या सरदारांस बोलावूं पाठविलें व कळविलें
कीं एवढीच एक वेळ या; त्यानें आपलें सारें ह्रद्गत
मला सांगितलें आहे. तेव्हां पलिष्ट्यांचे सरदार हातीं
दाम घेऊन तिच्याकडे आले. १९ तिनें शमशोनास
आपल्या मांडीवर निजविलें; आणि एक मनुष्य जवळ
बोलावून त्याच्या डोक्याच्या सात बटा मुंडविल्या; ती
त्याला त्रासवूं लागली व तो अगदीं निर्बळ झाला. २० ती
त्यास म्हणाली, शमशोना, पलिष्टी तुमच्यावर चालून
आले आहेत. तेव्हां तो झोपेंतून उठला व आपण
पहिल्याप्रमाणेंच अंग हालवून सुटून जाऊं असें
त्याला वाटलें. परमेश्वरानें आपणाला सोडिलें आहे
याची कल्पना त्याला नव्हती. २१ पलिष्टी लोकांनीं
त्याला पकडून त्याचे डोळे फोडिले व त्यास गज्जा येथें
नेऊन पितळी बेड्यांनीं जखडिलें; तो कारागृहांत धान्य
दळूं लागला; २२ पण त्याचें मुंडन झाल्यावर त्याच्या
डोक्याचे केस पुन: वाढूं लागले.

२३ नंतर पलिष्ट्यांचे सरदार आपल्या दागोन
नामक देवाच्या प्रीत्यर्थ महायज्ञ व उत्सव करावयास
जमा झाले; ते म्हणाले, आमच्या देवानें आमचा शत्रु
शमशोन यास आमच्या हातीं दिलें आहे. २४ लोकांनीं
त्यास पाहून आपल्या देवाची स्तुति करून म्हटलें,
आमच्या देवानें आमच्या देशाचा विध्वंस करणाऱ्या
आणि आमच्यांतल्या बहुत लोकांचा संहार करणाऱ्या
शत्रूस आमच्या हातीं दिलें आहे. २५ ते आनंदाच्या
भरांत येऊन म्हणाले, शमशोनास घेऊन या,
त्याची आम्हांला करमणूक होईल. तेव्हां त्यांनीं
शमशोनास तुरुंगांतून आणविलें, आणि तो त्यांच्या-
पुढें गंमत करूं लागला; आणि त्यांनीं त्यास खांबांच्या
मध्यें उभें केलें. २६ शमशोनाचा हात ज्या मुलानें
धरिला होता त्यास तो म्हणाला, ज्या खांबांवर हें घर
उभें आहे ते मला चाचपूं दे, म्हणजे मी त्यांशीं टेकेन.
२७ त्या मंदिरांत स्त्रीपुरुषांची मनस्वी गर्दी झाली
होती; तेथें पलिष्ट्यांचे सर्व सरदार होते; धाब्यावर
तीन हजार स्त्रीपुरुष शमशोनाची गंमत पाहत होते.
२८ तेव्हां शमशोनानें परमेश्वराचा धावा केला कीं हे
प्रभू देवा, माझी आठवण कर; हे देवा, या एवढ्या
प्रसंगीं मला बळ दे, म्हणजे मी आपल्या ह्या दोन
डोळ्यांबद्दल पलिष्ट्यांचा एकदम सूड घेईन. २९ ज्या
दोन मधल्या खांबांवर त्या मंदिराचा आधार होता
त्यांतला एक उजव्या हातानें व एक डाव्या हातानें
धरून शमशोन त्यावर टेकला. ३० पलिष्ट्यांबरोबर
मलाहि मरण येवो असें म्हणून शमशोनानें आपलें
सर्व बळ खर्चून ते खांब रेटले; तेव्हां तें मंदिर त्या
सरदारांवर व त्यांत जमलेल्या सर्व लोकांवर पडलें. या
प्रकारें त्यानें मरतेसमयीं मारिलेले लोक आपल्या साऱ्या
हयातींत मारिलेल्या लोकांहून अधिक होते. ३१ मग
त्याचे भाऊबंद व त्याच्या बापाच्या घराण्यांतील सर्व
लोक आले व त्यास उचलून घेऊन गेले; त्यांनीं सरा
व अष्टाबोल यांच्या दरम्यान जेथें त्याचा बाप मानोहा
याचें कबरस्तान होतें तेथें त्यास मूठमाती दिली. त्यानें
इस्राएलाचा न्यायनिवाडा वीस वर्षें केला होता.

१७ १ एफ्राइमाच्या डोंगराळ प्रदेशांत मीखा
नांवाचा एक मनुष्य राहत असे. २ तो
आपल्या आईस म्हणाला, जें अकराशें रुपये
तुजपासून हिरावून नेल्याबद्दल तूं शाप दिला होता व
ज्यांविषयीं तूं बोलतांना मीं ऐकलें होतें ते मजपाशीं
आहेत; मींच ते घेतले होते. तेव्हां त्याची आई
म्हणाली, माझ्या पुत्राचें परमेश्वर अभीष्ट करो.
३ त्यानें ते अकराशें रुपये आपल्या आईस परत
दिल्यावर त्याच्या आईनें म्हटलें, माझ्या पुत्राप्रीत्यर्थ
माझ्या हातचे हे रुपये मीं परमेश्वरास वाहिले आहेत;
यांची एक कोरींव मूर्ति व एक ओतींव मूर्ति करावी,
म्हणून हे पैसे मी तुला परत देतें. ४ त्यानें ते रुपये
आपल्या आईस परत दिले तेव्हां तिनें त्यांतले दोनशें
रुपये सोनारास दिले, त्यानें त्यांची एक कोरींव
मूर्ति व एक ओतींव मूर्ति केली आणि ती
मीखाच्या घरीं ठेविली. ५ मीखाचें एक देवघर होतें;
त्यानें एक एफोद आणि कुलदेवता केल्या होत्या
व त्यानें आपल्या एका पुत्रास दीक्षा देऊन आपला
पुरोहित केलें होतें. ६ त्या काळीं इस्राएलाचा कोणी
राजा नव्हता; जो तो आपल्या नजरेस येई तसें
करीत असे.

७ यहूदांतील बेथलहेम येथला रहिवासी यहूदा
कुळांतील एक तरुण लेवी तेथें उपरी म्हणून राहत
होता. ८ कोठें तरी आपणास ठिकाण मिळावें म्हणून
तो यहूदांतील बेथलहेम नगरांतून निघाला; प्रवास
करितां करितां एफ्राइमाच्या डोंगरांत मीखाच्या घरीं तो
आला. ९ मीखानें त्यास विचारिलें, तूं कोठून आलास?
तो त्यास म्हणाला, यहूदाच्या बेथलहेमांतला मी एक
लेवी आहें; थारा मिळेल तेथें जाऊन राहावें म्हणून
मी निघालों आहें. १० मीखा त्यास म्हणाला,
माझ्या येथें राहा; तूं माझा वडील व पुरोहित होऊन
राहा; मी तुला सालिना दहा रुपये, एक पोषाख
आणि पोटास देईन. तेव्हां तो लेवी त्याच्या घरीं
जाऊन राहिला. ११ तो लेवी त्या मनुष्याबरोबर
राहण्यास राजी झाला; तो तरुण पुरुष त्याच्याशी
पुत्रासारखा वर्तला. १२ मीखानें त्या लेव्यास दीक्षा
दिली, आणि तो तरुण लेवी त्याचा पुरोहित होऊन
त्याच्या घरीं राहूं लागला. १३ यावर मीखा
म्हणाला कीं मीं एक लेवी आपला पुरोहित करून
ठेविला आहे, तर आतां परमेश्वर खात्रीनें माझें
बरें करील.

१८ १ त्या काळीं इस्राएलाचा कोणी राजा
नव्हता; दान वंशाचे लोक त्या वेळीं वस्तीसाठीं
वतन पाहत होते; कारण इस्राएली वंशांबरोबर
त्यांस वतनभाग अजून मिळाला नव्हता. २ तेव्हां
दानवंशजांनीं आपल्या कुळांतल्या सगळ्या लोकांतून
पांच शूर वीर निवडून त्यांस सरा व अष्टावोल येथून
देश धुंडाळून पाहण्यास पाठविलें; त्यांस ते म्हणाले,
जा आणि तो प्रांत धुंडाळा; ते एफ्राइमाच्या डोंगरी
प्रदेशांतील मीखाच्या घरापर्यंत येऊन तेथें बिऱ्हाडास
राहिले. ३ ते मीखाच्या घरापाशीं असतां त्यांनीं त्या
तरुण लेव्याचा शब्द ओळखिला; तेव्हां ते त्याजकडे
जाऊन त्याला विचारूं लागले, तुला येथें कोणीं आणिलें?
तूं येथें काय करितोस? तुझें येथें काय आहे?
४ त्यानें त्यांस सांगितलें कीं मीखानें माझें असें असें
केलें; त्यानें मला वेतन देऊन ठेविलें असून मी त्याचा
पुरोहित झालों आहें. ५ ते त्यास म्हणाले, देवास प्रश्न
विचारून पाहा कीं ज्या प्रवासास आम्ही निघालों आहों
तो यशस्वी होईल कीं नाहीं? ६ तो पुरोहित त्यांस
म्हणाला, तुम्ही खुशाल जा; ज्या प्रवासास तुम्ही
निघालां आहां तो परमेश्वरासमोर रुजू आहे.

७ मग ते पांच पुरुष निघून लइश येथें गेले; तेथें
त्यांस असें दिसून आलें कीं तेथील लोक सिदोनी
लोकांप्रमाणें निश्चिंत, स्वस्थ व निर्भय आहेत, त्यांस
कसलाहि उपद्रव देणारा कोणी सत्ताधीश त्या देशावर
नाहीं, व ते सिदोन्यांपासून फार दूर राहत असून
इतर लोकांशीं त्यांचा कांहीं व्यवहार नाहीं. ८ मग ते
सरा व अष्टावोल येथें आपल्या भाऊबंदांकडे परत
आले; तेव्हां त्यांचे भाऊबंद त्यांस विचारूं लागले,
तुम्हीं काय वर्तमान आणिलें आहे? ९ त्यांनीं म्हटलें,

चला; उठा, आपण त्या लोकांवर चालून जाऊं; आम्हीं
तो देश पाहिला आहे, तो फार चांगला आहे; तुम्ही
स्वस्थ कां बसलां आहां? तेथें जाऊन तो देश ताब्यांत
घेण्याविषयीं कांहीं आळस करूं नका. १० तेथें गेल्या-
वर तुम्हांस निश्चिंतपणें राहणारे लोक सांपडतील;
व तो देश विस्तीर्ण आहे; देवानें तो देश तुमच्या
हातीं दिला आहे; तें ठिकाण असें आहे कीं पृथ्वी-
वरल्या कोणत्याहि गोष्टीची तेथें वाण नाहीं.

११ तेव्हां सरा व अष्टावोल येथून दान कुळांतले
सहाशें पुरुष हत्यारबंद होऊन निघाले. १२ त्यांनीं
कूच करून यहूदांतील किर्याथ-यारीम येथें तळ दिला;
यामुळें आजवर त्या स्थलास महानेदान (दानाची
छावणी) असें म्हणतात; तें किर्याथ-यारीमाच्या
पश्चिमेस आहे. १३ तेथून निघून ते एफ्राइमाच्या
डोंगरी प्रदेशांत मीखाच्या घरापाशीं आले. १४ तेव्हां
जे पांच पुरुष लईश प्रदेश हेरावयास गेले होते
ते आपल्या बांधवांस म्हणाले, तुम्हांस ठाऊक
आहे काय? या घरांत एक एफोद, कुलदेवता,
एक कोरींव मूर्ति आणि एक ओतींव मूर्ति
अशीं आहेत; आतां तुम्हीं काय करावयाचें
याचा चांगला विचार करा. १५ ते तिकडे वळले
आणि मीखाच्या घरीं असलेल्या लेव्याच्या बिऱ्हाडीं
जाऊन त्याचें त्यांनीं क्षेमकुशल विचारिलें. १६ मग ते
दानवंशांतले सहाशें हत्यारबंद पुरुष वेशींत उभे
राहिले; १७ आणि जे पांच पुरुष देशाची पाहणी
करावयास गेले होते ते आंत शिरून ती कोरींव
मूर्ति, एफोद, कुलदेवता व ओतींव मूर्ति घेऊन
गेले; आणि तो पुरोहित त्या हत्यारबंद सहाशें
पुरुषांबरोबर वेशींत उभा राहिला. १८ ते पांच पुरुष
मीखाच्या घरांत शिरून कोरींव मूर्ति, एफोद, कुल-
देवता व ओतींव मूर्ति घेऊन आले तेव्हां पुरोहित
त्यांस म्हणाला, तुम्हीं हें काय करितां? १९ ते त्यास
म्हणाले, गप्प राहा, आपलें तोंड हातानें दाबून धर
व आम्हांबरोबर येऊन तूं आमचा वडील व पुरोहित
होऊन राहा; एकाच मनुष्याच्या घरीं पुरोहित होऊन
राहावें हें तुला बरें कीं इस्राएलाच्या एका सगळ्या
वंशाचा व कुळाचा पुरोहित व्हावें हें बरें?
२० तेव्हां त्या पुरोहिताचें चित्त प्रसन्न झालें व
एफोद, कुलदेवता व कोरींव मूर्ति घेऊन तो
त्या लोकांबरोबर गेला. २१ तेव्हां ते पुनः
वाटेस लागले; त्यांनीं मुलेंबाळें, पशु आणि सामान-
सुमान आपल्यापुढें चालवून कूच केलें; २२ ते
मीखाच्या घरापासून बरेंच दूर गेल्यावर त्याच्या
घराच्या आसपासच्या घरांत राहणाऱ्या लोकांनीं जमा
होऊन दानवंशजांस जाऊन गांठिलें; २३ त्यांनीं
दानवंशाच्या लोकांस हाका मारिल्या; तेव्हां त्यांनीं
तोंडें फिरवून मीखास म्हटलें, तुझें काय झालें कीं तूं
एवढा समुदाय घेऊन आला आहेस? २४ तो
म्हणाला, मीं केलेले देव व माझा पुरोहित तुम्ही
घेऊन चाललां; आतां माझें काय राहिलें आहे?
आणि मला विचारितां कीं तुझें काय झालें म्हणून?
२५ दानवंशाचे लोक त्यास म्हणाले, तुझें बोलणें
आमच्या लोकांच्या कानीं पडूं देऊं नको, दिलें तर
ते रागावून तुजवर तुटून पडतील आणि तूं व तुझ्या
घरचे लोक प्राणांस मुकतील. २६ मग दानवंशाचे
लोक आपल्या वाटेनें गेले; इकडे मीखानें पाहिलें कीं
हे लोक आपणाहून अधिक बलवान आहेत, तेव्हां तोहि
परतून आपल्या घरीं गेला. २७ मीखानें बनविलेल्या
वस्तु व त्याचा पुरोहित बरोबर घेऊन ते लईश येथें
आले; तेथील लोक स्वस्थपणें व निश्चिंतपणें राहत होते;
त्यांनीं त्यांचा तरवारीनें संहार करून त्यांचें नगर
अग्नीनें जाळून टाकिलें. २८ त्या नगराचा बचाव
करावयास कोणी नव्हता; कारण तें सिदोनापासून दूर
होतें आणि इतर लोकांशीं त्या लोकांचा व्यवहार
नव्हता; तें नगर बेथ-रहोबच्या खोऱ्यांत होतें; मग तें
नगर वसवून तेथें ते राहिले. २९ त्यांनीं त्या नगरास
आपला मूळपुरुष दान जो इस्राएलाचा एक पुत्र त्याचें
नांव दिलें; पूर्वी त्या नगराचें नांव लईश होतें.
३० दानवंशाच्या लोकांनीं त्या कोरींव मूर्तीची
स्थापना केली; देशाचा पाडाव होईपर्यंत गेर्षोमाचा

पुत्र व मोशाचा नातू योनाथान व त्याचे वंशज दान-
वंशाचा पुरोहितपणा करीत असत. ३१ देवाचें
निवासस्थान शिलो येथें होतें तोंपर्यंत मीखाची कोरींव
मूर्ति तेथें स्थापिलेली होती.

१ त्या काळीं इस्राएलाचा कोणी राजा
१९ नव्हता; तेव्हां कोणीएक लेवी एफ्राइमाच्या
डोंगरी प्रदेशाच्या बाजूला उपरी म्हणून राहत
असे; त्यानें यहूदांतील बेथलहेम येथील एक उपपत्नी
केली होती. २ त्याच्या उपपत्नीनें त्यास सोडून व्यभि-
चार केला व ती यहूदांतील बेथलहेम येथें आपल्या
बापाच्या घरीं जाऊन चार महिने राहिली. ३ नंतर
तिची समजूत घालून तिला माघारें आणावें म्हणून
तिचा पति एक सेवक व दोन गाढवें बरोबर घेऊन
तिच्या शोधास निघाला; तिनें त्यास आपल्या बापाच्या
घरीं नेलें; त्या मुलीच्या बापानें त्याला पाहिलें तेव्हां
त्याची भेट झाल्यावरून त्याला आनंद झाला. ४ त्या
मुलीच्या बापानें म्हणजे त्याच्या सासऱ्यानें त्याला
राहण्याचा आग्रह केला, तेव्हां तो तेथें तीन दिवस
त्याच्या घरीं राहिला; ह्याप्रमाणें त्यांचें खाणेंपिणें झाल्या-
वर तीं तेथें मुक्कामास राहिलीं. ५ चौथ्या दिवशीं
सकाळीं पहाटेस उठल्यावर तो जाण्यास निघाला तेव्हां
मुलीच्या बापानें आपल्या जांवयास म्हटलें कीं
कोरभर भाकर खाऊन जिवास आधार करा आणि
मग मार्गस्थ व्हा. ६ तेव्हां त्या दोघांनीं बसून एकत्र
खाणेंपिणें केलें; मग त्या मुलीच्या बापानें त्यास म्हटलें,
प्रसन्न मनानें आणखी एक रात्र राहण्यास राजी हो.
७ तो पुरुष जावयास निघाला पण त्याच्या सासऱ्यानें
त्यास आग्रह केला म्हणून त्यानें आणखी मुक्काम
केला. ८ पांचव्या दिवशीं पहाटेस उठून तो जावयास
निघाला तेव्हां त्या मुलीच्या बापानें म्हटलें, आपल्या
जिवास आधार कर आणि दिवस कलेपर्यंत राहा;
तेव्हां त्या दोघांनीं पुनः एकत्र भोजन केलें. ९ मग
तो पुरुष आपली उपपत्नी व सेवक यांसहवर्तमान
जावयास निघाला तेव्हां त्या मुलीचा बाप म्हणजे
त्याचा सासरा त्यास म्हणाला, पाहा, दिवस कलला
आहे, तर तुम्ही रात्रीं येथेंच राहा; दिवस आतां
मावळेल तर येथेंच राहून आपलें मन हर्षित करा;
उद्यां सकाळीं पहाटेस उठून मार्गस्थ व्हा व आपल्या
घरीं जा; १० पण तो पुरुष त्या रात्रीं तेथें राहीना, तो
उठून मार्गस्थ झाला. तो खोगीर घातलेलीं आपलीं दोन
गाढवें आणि आपली उपपत्नी यांसह यबूसच्या म्हणजे
यरुशलेमाच्या नजीक आला. ११ यबूस नगरापाशीं ते
आले तेव्हां दिवस बराच खालीं गेला होता; तेव्हां
सेवकानें आपल्या धन्यास म्हटलें, चला, आपण
यबूसी लोकांच्या या नगरांत जाऊन मुक्काम करूं.
१२ त्याचा धनी त्यास म्हणाला, जेथें कोणी इस्राएल
लोक राहत नाहींत अशा परक्यांच्या नगरांत
आपण उतरूं नये, तर आपण गिबा येथें जाऊं. १३ तो
आपल्या चाकरास म्हणाला, आपण जवळच्या एकाद्या
ठिकाणीं जाऊं; गिबा अथवा रामा येथें रात्र घालवूं.
१४ तेव्हां ते पुढें चालले आणि बन्यामिनाच्या गिब्या-
पाशीं पोहंचल्यावर सूर्यास्त झाला. १५ गिब्यांत
जाऊन मुक्काम करावा म्हणून ते तिकडे गेले; तो
आंत जाऊन नगराच्या चौकांत बसला; कारण कोणींहि
त्यांस आपल्या घरीं राहावयास जागा दिली नाहीं.
१६ इतक्यांत एक म्हातारा आपलें शेतांतलें काम
आटपून संध्याकाळीं घरीं चालला होता; तो एफ्राइमाच्या
डोंगराळ प्रदेशांतला असून गिबा येथें उपरी
म्हणून राहत होता; त्या ठिकाणचे लोक बन्यामिनी
होते. १७ त्या म्हाताऱ्यानें पाहिलें तों नगराच्या
चवाठ्यावर कोणी प्रवासी बसला आहे असें त्याच्या
दृष्टीस पडलें; त्या म्हाताऱ्यानें त्यास विचारिलें, तूं
कोठें चाललास? तूं कोठून आलास? १८ तो त्यास
म्हणाला, आम्ही यहूदाच्या बेथेलहेमाहून निघालों
आहों आणि आम्हांस एफ्राइमाच्या डोंगराळ प्रदेशाच्या
पलीकडल्या बाजूस जावयाचें आहे; मी तेथलाच
आहें; मी बेथलहेम-यहूदा येथें गेलों होतों व आतां
परमेश्वराच्या मंदिराकडे जात आहें; मला येथें कोणी
घरीं जागा देत नाहीं. १९ आमच्या गाढवांस दाणा-
वैरण आहे, आणि माझ्यासाठीं, या आपल्या दासीसाठीं व

या आपल्या दासाबरोबरच्या चाकरासाठीं आपल्या दासाजवळ भाकर व द्राक्षारस आहे; कोणत्याहि गोष्टीची वाण नाहीं. २० म्हातारा म्हणाला, तुझें क्षेम असो; तुला जें पाहिजे तें मजकडे लागलें; मात्र रस्त्यांत मुक्काम करूं नको. २१ मग त्यानें त्यास आपल्या घरीं नेलें व त्याच्या गाढवांस वैरण दिली, आणि त्यांनीं हातपाय धुऊन खाणेंपिणें केलें. २२ ते आनंदांत असतां गांवांतल्या कित्येक अधम लोकांनीं येऊन तें घर वेढिलें व दार ठोकून त्या घराचा धनी जो म्हातारा त्यास ते म्हणूं लागले, जो पुरुष तुझ्या घरीं आला आहे त्यास बाहेर काढ म्हणजे आम्ही त्यास जाणूं. २३ घरधनी बाहेर जाऊन त्यांस म्हणूं लागला, नाहीं; बांधवहो, अशी दुष्टाई करूं नका; हा पुरुष माझ्या घरीं आला आहे, तर असलें बेशरमपणाचें काम करूं नका. २४ पाहा, येथें माझी कन्या कुमारी आहे व या पुरुषाची उपपत्नी आहे त्यांस मी बाहेर आणितों; तुम्ही त्यांची अब्रू घ्या, त्यांच्याशीं वाटेल तें करा, पण या पुरुषाशीं असलें बेशरमपणाचें काम करूं नका. २५ तरी तीं माणसें त्याचें ऐकतना; तेव्हां त्या पुरुषानें आपली उपपत्नी त्यांजकडे बाहेर नेऊन सोडिली; त्यांनीं तिजशीं कुकर्म केलें आणि रात्रभर पहाट होईपर्यंत तिचे हालहाल केले; सकाळीं उजाडूं लागलें तेव्हां त्यांनीं तिला सोडिलें. २६ प्रभात होतांच ती स्त्री आपला धनी ज्या माणसाच्या घरीं होता तेथें येऊन चांगलें उजाडेपर्यंत दाराशीं पडून राहिली; २७ सकाळीं तिच्या पतीनें उठून घराचे दरवाजे उघडले व मार्गस्थ व्हावें म्हणून तो बाहेर आला तों त्याची उपपत्नी दाराशीं पडली असून तिचे हात उंबरठ्यावर आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. २८ तो तिला म्हणाला, चल, आपण जाऊं; पण कांहीं उत्तर येईना; तेव्हां तिला आपल्या गाढवावर घालून तेथून तो आपल्या ठिकाणीं गेला. २९ आपल्या घरीं त्यानें सुरी घेऊन आपल्या उपपत्नीस धरून तिचे अवयव कापून सुटे केले, आणि तिचीं बारा शकलें करून इस्राएलाच्या सर्व प्रदेशांत पाठवून दिलीं. ३० ज्यांनीं ज्यांनीं तें पाहिलें ते सर्व म्हणूं लागले, इस्राएल लोक मिसर देशांतून आले तेव्हांपासून आजवर असलें कृत्य कधीं झालें नाहीं कीं कोणीं पाहिलें नाहीं, तर याविषयीं विचार करा, मसलत करा, आणि आपला अभिप्राय सांगा.

२० १ मग दानापासून बैर-शेबापर्यंतचे सर्व इस्राएल लोक व गिलादांतले लोक बाहेर पडले व त्यांची सर्व मंडळी एकजीव होऊन मिस्पा येथें परमेश्वरापाशीं जमा झाली. २ लोकांचे सर्व नायक आणि इस्राएलाच्या सर्व वंशांतले लोक मिळून चार लक्ष धारकरी पायदळ देवाच्या प्रजेच्या मेळ्यांत हजर झाले. ३ इस्राएल लोक मिस्पांत जमा झाले आहेत हें बन्यामिनी वंशांतल्या लोकांच्या कानीं गेलें. इस्राएल लोक म्हणाले, हें दुष्कर्म कसें घडून आलें तें आम्हांस सांगा. ४ तेव्हां त्या खून झालेल्या स्त्रीचा नवरा लेवी यानें सांगितलें कीं मी आपल्या उपपत्नीसहित बन्यामिनाच्या गिब्यांत मुक्कामास होतों. ५ तेथें गिब्यांतल्या पुरुषांनीं मजवर चालून येऊन रात्रीच्या समयीं घरास वेढा घालून माझा घात करावयास पाहिलें; त्यांनीं माझ्या उपपत्नीवर एवढा बलात्कार केला कीं ती मरण पावली. ६ तेव्हां मीं आपल्या उपपत्नीस धरून तिचीं शकलें करून इस्राएलाच्या वतनभागांतील सर्व प्रांतांत तीं पाठवून दिलीं; कारण त्या लोकांनीं इस्राएलामध्यें भ्रष्टाचार व बेशरमपणाचें कर्म केलें आहे. ७ तर इस्राएल लोकहो, तुम्ही सर्व आतां आपला अभिप्राय व मसलत द्या. ८ तेव्हां एकदम सगळे लोक उठून म्हणाले, आमच्यांतला कोणी आपल्या डेऱ्यांत जावयाचा नाहीं; आमच्यांतला कोणी आपल्या घरीं जावयाचा नाहीं; ९ आम्ही गिब्याचें असें करणार: आम्ही त्यावर चालून जाणार, कोणीं जावें तें चिठ्या टाकून ठरविणार. १० मग सर्व इस्राएल वंशांतील शंभर पुरुषांमागें दहा, हजारामागें शंभर, आणि दहा हजारांमागें एक हजार असे पुरुष निवडूं, म्हणजे ते सैन्यासाठीं भोजनसामग्री आणितील, व आम्ही बन्यामिनाचें गिबा येथें जाऊन त्यांनीं इस्राएलामध्यें जें बेशरमपणाचें कर्म केलें आहे

त्याबद्दल त्यांचें पारिपत्य करूं. ११ समळे इस्राएल
लोक एकजीव होऊन त्या नगरासमोर जमा झाले.

१२ मग इस्राएल वंशांतल्या लोकांनीं बन्यामिनाच्या
सर्व वंशांकडे कांहीं मनुष्यें पाठवून विचारिलें कीं तुमच्या-
मध्यें हें काय दुष्कर्म घडलें आहे? १३ गिब्यांतील
त्या अधम लोकांस आमच्या हवालीं करा, म्हणजे
आम्ही त्यांचा संहार करून इस्राएलांतील दुष्टता
काढून टाकूं; पण बन्यामिनी लोकांनीं आपले भाऊबंद
इस्राएल लोक यांचें ऐकलें नाहीं. १४ मग बन्यामिनी
लोक आपआपल्या नगरांतून बाहेर येऊन इस्राएल
लोकांशीं लढण्यासाठीं गिबा येथें जमा झाले. १५ त्या
दिवशीं गिब्यांतले राहणारे सातशें निवडक पुरुष
खेरीज करून निरनिराळ्या नगरांहून आलेल्या धार-
करी बन्यामिन्यांची संख्या सव्वीस हजार होती.
१६ त्या सर्व लोकांमध्यें सातशें निवडक पुरुष डावरे होते,
त्यांच्या गोफणीचा नेम केसभर देखील चुकत नसे.

१७ बन्यामीनवंश खेरीज करून अवांतर इस्राएल
लोकांतले धारकरी पुरुष चार लक्ष भरले; हे सगळे
लढवय्ये होते. १८ मग इस्राएल लोक निघून बेथेल येथें
गेले आणि त्यांनीं देवास विचारिलें कीं बन्यामिनाशीं
लढण्यासाठीं प्रथम कोणीं चाल करून जावें? परमे-
श्वरानें सांगितलें, यहूदानें प्रथम जावें. १९ इस्राएल
लोकांनीं पहाटेस उठून गिब्यासमोर तळ दिला.
२० इस्राएल लोक बन्यामिनाशीं लढण्यासाठीं बाहेर
निघाले; गिबा येथें त्यांच्याशीं लढावयास इस्राएल
लोकांनीं व्यूहरचना केली. २१ तेव्हां बन्यामिनी
लोकांनीं गिब्यांतून बाहेर पडून त्या दिवशीं बावीस
हजार इस्राएल पुरुष धुळीस मिळविले. २२ तरी
इस्राएल लोकांनीं हिंमत धरून जेथें पहिल्या दिवशीं
व्यूह रचिला होता तेथेंच पुनः दुसरा व्यूह रचिला.
२३ इस्राएल लोक जाऊन संध्याकाळपर्यंत परमे-
श्वरासमोर रडले; आणि आपला बंधु बन्यामीन
याच्या लोकांशीं लढावयास पुनः जाऊं काय असें
परमेश्वराला त्यांनीं विचारिलें; तेव्हां परमेश्वरानें म्हटलें
त्यांजवर चाल करून जा.

२४ दुसऱ्या दिवशीं इस्राएल लोक बन्यामिनी लोकांशीं
अगदीं निकट जाऊन भिडले. २५ बन्यामीन दुसरे
दिवशीं त्यांच्याशीं सामना करण्यास गिब्याहून निघाला,
आणि त्या दिवशींहि त्यानें इस्राएलाचे अठरा हजार पुरुष
धुळीस मिळविले; ते सर्व धारकरी होते. २६ मग सर्व
इस्राएल लोक मिळून बेथेल येथें जाऊन परमेश्वरापुढें
रडत बसले; त्या दिवशीं त्यांनीं संध्याकाळपर्यंत
उपास केला आणि परमेश्वरास होमबलि व शांत्यर्पणें
अर्पिलीं. २७ मग इस्राएल लोकांनीं परमेश्वराला प्रश्न
केला. त्या समयीं देवाचा कराराचा कोश तेथेंच होता,
२८ आणि अहरोनाचा नातू, एलाजाराचा पुत्र फिन-
हास हा त्या काळीं त्या कोशाच्या सेवेस असे. लोकांनीं
परमेश्वरास विचारिलें कीं आमचे भाऊबंद बन्यामिनी
यांच्याशीं लढावयास पुनः एकवार जाऊं काय? किंवा
लढण्याचें सोडून देऊं? परमेश्वरानें म्हटलें, चाल
करून जा, कारण उद्यां मी त्यांस तुझ्या हातीं देईन.
२९ मग इस्राएल लोकांनीं गिब्याच्या सभोंवार दबा
धरणारे बसविले.

३० तिसऱ्या दिवशीं इस्राएल लोकांनीं बन्यामिन्यांवर
पुनः चाल केली आणि पहिल्याप्रमाणें गिब्यासमोर
व्यूह रचिला. ३१ तेव्हां बन्यामिनी त्या लोकांशीं
भिडावयास नगराबाहेर आले; आणि त्या वेळीं त्यांनीं
त्यांना आपल्यामागें बरेंच दूर नेलें; एक रस्ता बेथेलास
व दुसरा मैदानांत गिब्याकडे जातो, त्यांच्या दरम्यान
पूर्वींच्या खेपांप्रमाणें त्यांनीं हाणमार सुरू केली,
व इस्राएलांपैकीं तीस माणसें मारिलीं. ३२ बन्यामिनी
लोकांस वाटलें कीं आतां पहिल्याप्रमाणेंच आम्हांसमोर
त्यांचा मोड होत आहे; इकडे इस्राएल लोक म्हणाले,
आम्ही पळण्याचें मिष करून ते नगरापासून दूर हम-
रस्त्यावर येतील असें करूं. ३३ मग सर्व इस्राएल
पुरुषांनीं आपलें ठाणें सोडून बाल-तामार येथें व्यूह
रचिला आणि जे इस्राएल दबा धरून बसले होते तेहि
आपलें ठिकाण मारे-गिबा येथून अचानक उठले.
३४ इस्राएलांतले निवडक दहा हजार पुरुष गिब्यासमोर
आले व तेथें तुंबळ युद्ध झालें; पण आपणांवर आपत्ती

अनर्थ येऊन ठेपला आहे हें त्यांस ठाऊक नव्हतें.
३५ परमेश्वरानें इस्राएलापुढें बन्यामिनाचा मोड केला;
त्या दिवशीं इस्राएल लोकांनीं पंचवीस हजार एकशें
बन्यामिनी पुरुषांचा संहार केला. ते सर्व धारकरी होते.

३६ तेव्हां आपला मोड झाला असें बन्यामिन्यांच्या
लक्षांत आलें; इस्राएल लोक बन्यामिन्यांपुढून हटले,
कारण गिब्याजवळ जे लोक दबा धरून बसविले
होते त्यांजवर त्यांची भिस्त होती. ३७ तेव्हां
दबा धरणाऱ्या लोकांनीं त्वरा करून गिब्यावर
छापा घातला आणि पुढें सरसावून सर्व नगराचा
तरवारीनें संहार केला. ३८ इस्राएल लोक आणि दबा
धरणारे यांच्यामध्यें एक खूण ठरली होती कीं त्यांनीं
नगरांतून धूर करून त्याचा लोळ वर चढेसें करावें.
३९ इस्राएली पुरुष लढाईंत मागें सरूं लागले तेव्हां
बन्यामिन्यांनीं हाणमार करून इस्राएलाचे तीस इसम
मारिले; बन्यामिन्यांस वाटलें कीं पहिल्या लढाईप्रमाणेंच
आतां आमच्यापुढें यांचा मोड होत आहे; ४० पण
नगरांतून धुराचा लोळ वर चढूं लागला, आणि बन्या-
मिन्यांनीं मागें वळून पाहिलें तों सगळ्या नगरांत धूरच
धूर होऊन आकाशाकडे त्याचा लोट चालला आहे
असें त्यांच्या दृष्टीस पडलें. ४१ तेव्हां इस्राएल लोक
उलटले आणि बन्यामिनी लोकांची गाळण उडाली;
आपल्यावर अरिष्ट आलें आहे असें त्यांच्या लक्षांत
येऊन चुकलें. ४२ तेव्हां त्यांनीं इस्राएली पुरुषांस पाठ
दाखवून रानाचा रस्ता धरिला; पण लढाईची गर्दी
त्यांच्या पाठीशीं होतीच; वाटेनें निरनिराळ्या गांवांतून
जे लोक बाहेर निघाले त्यांनीं त्यांचा धुव्वा उडविला.
४३ त्यांनीं बन्यामिन्यांस चोहोंकडून घेरिलें व त्यांच्या
पाठीस लागून मनूहा-गिब्याच्या पूर्वेपर्यंत त्यांची पाय-
मल्ली केली. ४४ बन्यामिनाचे अठरा हजार लोक पतन
पावले; ते सर्व शूर वीर होते. ४५ मग ते रिम्मोनाच्या
दुर्गाकडे रानांत पळून गेले; ते सडकांवरून धावत असतां
इस्राएल लोकांनीं त्यांतले पांच हजार पुरुष टिपून
मारिले आणि गिदोमापर्यंत त्यांचा पिच्छा पुरवून
त्यांतले आणखी दोन हजार पुरुष मारिले. ४६ या
प्रकारें बन्यामिनाचे पंचवीस हजार धारकरी पुरुष त्या
दिवशीं पतन पावले; ते सर्व शूर वीर होते. ४७ त्यांतले
सहाशें पुरुष रानाकडे पळून जाऊन रिम्मोनाच्या दुर्गावर
पोहंचले; त्या खडकावर ते चार महिने राहिले. ४८ मग
इस्राएली पुरुषांनीं मागें फिरून बन्यामिन्यांवर छापा
घातला आणि जे कोणी मनुष्य, पशु वगैरे त्यांस सांपडले
त्या सर्वांचा तरवारीनें संहार केला; आणि जीं नगरें
त्यांस आढळलीं तीं सर्व त्यांनीं आग लावून भस्म केलीं.

२१

१ इस्राएली पुरुषांनीं मिस्पा येथें प्रतिज्ञा
केली होती कीं आमच्यांतला कोणीहि बन्या-
मिन्यांस आपल्या मुली देणार नाहीं; २ म्हणून
बेथेल येथें जाऊन लोकांनीं संध्याकाळपर्यंत देवा-
समोर दीर्घस्वरानें आक्रंदन केलें. ३ ते म्हणाले, हे
परमेश्वरा, इस्राएलाच्या देवा, आज इस्राएलाचा एक
वंश कमी झाला असें कां घडून यावें? ४ दुसऱ्या
दिवशीं सकाळीं उठून तेथें त्यांनीं वेदी बांधिली आणि
होमबलि व शांत्यर्पणें अर्पिलीं. ५ मग इस्राएल लोक
पुसतपास करूं लागले कीं इस्राएलाच्या सर्व वंशांपैकीं
परमेश्वरासमोर जमलेल्या मेळ्यास आले नव्हते असे
कोणी आहेत काय? त्यांनीं फक्त प्रतिज्ञा केली होती
कीं जे कोणी मिस्पा येथें परमेश्वरासमोर येणार नाहींत
त्यांस अवश्य मारून टाकावें. ६ आपला बांधव
बन्यामीन याविषयीं इस्राएल लोकांस अनुताप होऊन
ते म्हणूं लागले कीं आज इस्राएलांतून एका वंशाचा
उच्छेद झाला आहे, ७ आम्हीं तर परमेश्वराची शपथ
वाहून म्हटलें आहे कीं आम्ही कोणीहि त्यांस आपल्या
मुली देणार नाहीं, तर त्यांतले जे उरले आहेत त्यांस
स्त्रिया मिळवून देण्याविषयीं काय करावें? ८ त्यांनीं
विचारलें, मिस्पा येथें परमेश्वरापाशीं इस्राएलाच्या
वंशांतले आले नाहींत असे कोण आहेत? तेव्हां
त्यांस कळलें कीं, याबेश-गिलादाहून कोणी त्या मेळ्यास
हजर राहण्यासाठीं छावणींत आले नाहींत. ९ कारण
लोकांची मोजदाद केली तेव्हां याबेश-गिलादाच्या
लोकांपैकीं कोणी हजर नव्हते असें आढळून आलें.
१० तेव्हां मंडळीनें अति शूर अशा बारा हजार

पुरुषांस पाठविलें; त्यांनीं त्यांस अशी आज्ञा केली कीं
तुम्ही याबेश-गिलादाच्या रहिवाश्यांचा बायकापोरांसह
संहार करा. ११ तुम्हांस कामगिरी करावयाची ती ही
कीं सर्व पुरुष आणि पुरुष पाहिलेल्या सर्व स्त्रिया यांचा
तुम्हीं अगदीं संहार करावा. १२ याबेश-गिलादच्या
रहिवाश्यांत ज्यांनीं पुरुष पाहिला नव्हता अशा चारशें
तरुण कुमारी त्यांच्या हातीं लागल्या; त्या त्यांनीं
कनान देशांतील शिलो येथल्या छावणींत आणिल्या.

१३ तेव्हां रिम्मोन दुर्गावर जे बन्यामिनी
राहिले होते त्यांजकडे सर्व मंडळीनें लोक पाठवून
त्यांच्याशीं सलयाचें बोलणें केलें. १४ तेव्हां बन्यामिनी
परत आले; आणि याबेश-गिलादच्या स्त्रियांपैकीं ज्या
जीवंत राखिल्या होत्या त्या त्यांस बायका करून दिल्या,
पण त्या त्यांस पुरल्या नाहींत. १५ परमेश्वरानें इस्राएल
वंशांत तूट पाडिली म्हणून लोक बन्यामिनाविषयीं
अनुताप करूं लागले.

१६ मंडळींतील वडील लोक म्हणूं लागले, बन्यामिनी
स्त्रियांचा संहार झाला आहे तर त्यांच्या अवशिष्ट
पुरुषांस स्त्रिया मिळवून देण्याविषयीं काय करावें?
१७ लोक म्हणाले कीं बन्यामिनाच्या अवशिष्ट लोकांस
वतन दिलें पाहिजे, म्हणजे इस्राएलांतून एक वंश नष्ट
होणार नाहीं. १८ आपणांपैकीं तर कोणास त्यांस मुली
देतां येत नाहींत; कारण इस्राएल लोकांनीं अशी
प्रतिज्ञा केली आहे कीं जो आपली कन्या बन्यामिन्यास
देईल तो शापित होईल. १९ त्यांनीं विचार काढिला
कीं शिलो हें नगर, बेथेलच्या उत्तरेस, बेथेलाहून
शखेमास जाणाऱ्या हमरस्त्याच्या पूर्वेस आणि लबोनाच्या
दक्षिणेस आहे; त्या शिलो नगरांत दर वर्षी परमेश्वरा-
प्रीत्यर्थ उत्सव होत असतो; २० म्हणून त्यांनीं बन्या-
मिन्यांस सांगितलें, तुम्ही जाऊन द्राक्षांच्या मळ्यांत दबा
धरून राहा; २१ आणि शिलोच्या कन्या नाचावयास
बाहेर पडतील तेव्हां तुम्ही द्राक्षांच्या मळ्यांतून बाहेर
निघा आणि शिलोच्या कन्यांतून एकेकीला एकेकानें
धरून बायको करावयासाठीं बन्यामिनाच्या देशीं घेऊन
जावें. २२ त्यांचे वडील अथवा भाऊबंद आम्हांकडे
गाऱ्हाणें घेऊन आले तर आम्ही त्यांस म्हणूं कीं कृपा करून
त्या दान म्हणून आम्हांस द्या; कारण युद्धांत त्या सर्वां-
साठीं बायका धरून देतां आल्या नाहींत आणि तुम्हींहि
आपण होऊन त्या तुमच्या मुली त्यांस दिल्या नाहींत,
म्हणून तुम्हांस दोष लागत नाहीं. २३ त्याप्रमाणें
बन्यामिनी लोकांनीं केलें; त्यांनीं त्या नाचणाऱ्या
मुलींतून आपल्या संख्येइतक्या पकडून बायका करून
घेतल्या; मग ते निघून आपल्या वतनास परत गेले
आणि नगरें वसवून त्यांत राहिले. २४ त्या समयीं
इस्राएल लोक तेथून निघून आपआपल्या वंशांकडे व
आपआपल्या घराण्यांकडे गेले; जो तो आपआपल्या
वतनास परत गेला. २५ त्या काळीं इस्राएलाचा कोणी
राजा नव्हता; ज्याला जें बरें दिसे तें तो करी.

# रूथ

—*०*—

1 १ शास्त्यांच्या अमदानींत देशांत दुष्काळ
पडला. त्या समयीं बेथलहेम-यहूदा येथील एक
पुरुष आपली स्त्री व दोन पुत्र घेऊन मवाब
देशांत कांहीं दिवस राहावयास गेला. २ त्या पुरुषाचें
नांव अलीमलेख, त्याच्या स्त्रीचें नांव नामी व त्याच्या
दोन पुत्रांचीं नांवें महलोन व खिल्योन अशीं होतीं; हीं
एफ्राथी, म्हणजे बेथलहेम-यहूदा येथील रहिवासी
होतीं; तीं मवाब देशांत जाऊन राहिलीं. ३ पुढें

नामीचा पति अलीमलेख हा वारला आणि नामी व
तिचे दोन पुत्र मागें राहिले. ४ त्या दोघांनीं दोन
मवाबी स्त्रिया बायका केल्या; एकीचें नांव अर्पा व
दुसरीचें नांव रूथ होतें; तीं तेथें सुमारें दहा वर्षे
राहिलीं. ५ नंतर महलोन आणि खिल्योन हे दोघे
मरण पावले; याप्रमाणें नामी आपले दोन मुलगे व
आपला पति यांस अंतरली. ६ परमेश्वरानें आपल्या
लोकांचा समाचार घेऊन त्यांस अन्न दिलें आहे असें
वर्तमान तिला मवाब देशांत कळलें तेव्हां त्या देशांतून
आपल्या दोघी सुनांसह परत जाण्यास ती निघाली.
७ ती आपल्या दोघी सुनांसह रहात होती तेथून
निघून यहूदा देशीं जावयास मार्गस्थ झाली. ८ नामी
आपल्या दोघी सुनांस म्हणाली, तुम्ही दोघी आतां
आपआपल्या माहेरीं जा; तुम्हीं जशी मृतांवर व
मजवर माया केली तशीच परमेश्वर तुम्हांवर करो.
९ परमेश्वर करो आणि तुम्हांस पतिगृह प्राप्त होऊन
विसावा मिळो. मग तिनें त्यांचें चुंबन घेतलें व त्या
हेल काढून रडूं लागल्या. १० त्या तिला म्हणूं
लागल्या, नाहीं, नाहीं, आम्ही तुम्हांबरोबर तुमच्या
लोकांकडे येणार. ११ नामी म्हणाली, माझ्या मुलींनो,
परत जा, तुम्ही मजबरोबर कां येतां? माझ्या पोटीं
का आणखी पुत्र आहेत कीं ते तुमचे पति होणार?
१२ माझ्या मुलींनो, माघारीं जा; मी आतां वृद्ध झालें
आहें; नवरा करण्याचें माझें वय नाहीं; मीं म्हटलें
कीं मला पति मिळावयाची आशा आहे व
आजच रात्रीं तो मिळाला आणि मला पुत्रहि झाले,
१३ तरी ते प्रौढ होत तोंपर्यंत तुम्ही त्यांची वाट
पाहाल काय? त्यांच्या अपेक्षेनें तुम्ही नवऱ्यांवांचून
राहाल काय? छे, छे, माझ्या मुलींनो, तुमच्यामुळें
मी मनस्वी कष्टी होत आहें; परमेश्वराचा हात मजवर
पडला आहे. १४ मग पुनः त्या हेल काढून रडूं
लागल्या; अर्पा हिनें आपल्या सासूचा मुका घेतला;
पण रूथ तिला बिलगून राहिली. १५ तेव्हां ती
म्हणाली, पाहा, तुझी जाऊ आपल्या लोकांकडे व
आपल्या देवाकडे परत गेली आहे तर तूंहि आपल्या
जावेच्या मागून जा. १६ रूथ म्हणाली, मला सोडून
जा आणि माझ्यामागें न येतां परत जा असा मला
आग्रह करूं नका; तुम्ही जेथें जाल तेथें मी येईन, तुम्ही
जेथें राहाल तेथें मी राहीन, तुमचे लोक ते माझे
लोक, तुमचा देव तो माझा देव; १७ तुम्ही मराल तेथें
मी मरेन व तेथेंच माझी मूठमाती होईल; मृत्यु
खेरीज करून तुमचा-माझा कशानेंहि वियोग झाला तर
परमेश्वर मला तदनुसार पारिपत्य करो, किंबहुना
अधिक करो. १८ आपल्याबरोबर जाण्याचा तिचा
पुरा निश्चय झाला आहे हें नामीनें पाहिलें तेव्हां तिनें
तिची समजूत घालण्याचें सोडिलें. १९ मग त्या
दोघी मार्गस्थ होऊन बेथलहेमास पोहंचल्या; त्या
बेथलहेमास जाऊन पोहंचल्या तेव्हां त्यांस पाहून सर्व
नगर गलबलून गेलें. तेथील बाया म्हणूं लागल्या, ही
नामीच काय? २० ती त्यांस म्हणाली, मला नामी
(मनोरमा) म्हणूं नका, तर मारा (क्लेशमया)
म्हणा; कारण सर्वसमर्थानें मला फारच क्लेश दिला
आहे. २१ मी भरलेली गेलें आणि परमेश्वरानें मला
रिकामी परत आणिलें; परमेश्वर मला प्रतिकूल
झाला, सर्वसमर्थानें मला पीडिलें आहे, तर मला
नामी कां म्हणतां? २२ याप्रमाणें नामी आपली
सून मवाबी रूथ हिला घेऊन मवाब देशांतून परत
आली; त्या दोघी बेथलहेमांत आल्या तेव्हां सातूच्या
हंगामास आरंभ झाला होता.

१ नामीच्या नवऱ्याचा एक नातेवाईक होता.
२ तो अलीमलेख याच्या कुळांतला असून मोठा श्रीमान्
माणूस होता, त्याचें नांव बवाज असें होतें. २ मवाबी
रूथ नामीस म्हणाली, मला शेतांत जाऊं द्या म्हणजे
कोणाची मजवर कृपादृष्टि झाल्यास त्याच्यामागून मी
धान्याचा सरवा वेचीत जाईन; ती म्हणाली, मुली,
जा. ३ ती जाऊन शेतांत कापणी करणाऱ्यांच्या मागून
सरवा वेचूं लागली. सुदैवेंकरून शेताच्या ज्या भागीं ती
गेली तो अलीमलेखाच्या कुळांतल्या बवाजाचा होता.
४ बवाज बेथलहेम गांवांतून शेतांत आला तेव्हां तो
कापणी करणाऱ्यांस म्हणाला, परमेश्वर तुमच्यासमागमें

असो. ते त्यास म्हणाले, परमेश्वर तुमचें अभीष्ट
करो. ५ मग बवाज कापणी करणाऱ्यांच्या मुकादमास
म्हणाला, ही मुलगी कोणाची? ६ कापणी करणाऱ्यांच्या
मुकादमानें म्हटलें, नामीबरोबर मवाब देशाहून आलेली
ही मवाबी मुलगी होय; ७ ही मला म्हणाली, कृपा
करून कापणी करणाऱ्यांच्या मागून पेंढ्यांमधला
सरवा मला वेचूं द्या; ती तेथें येऊन सकाळपासून
आतांपर्यंत वेचीत आहे, थोडा वेळ मात्र ती घरांत
बसली होती. ८ बवाज रूथेस म्हणाला, मुली,
ऐकतेस ना? तूं दुसऱ्याच्या शेतांत सरवा वेचावयास
येथून जाऊं नको; येथेंच माझ्या नोकरणींबरोबर राहा.
९ हे ज्या शेताची कापणी करीत आहेत त्याकडे
नजर ठेवून त्यांच्यामागून जा; तुला कांहीं त्रास पोचूं
नये अशी आज्ञा मीं या गड्यांस दिली नाहीं काय?
तुला तहान लागल्यास तूं भांड्यांकडे जाऊन या
गड्यांनीं भरून ठेविलेलें पाणी पी. १० तेव्हां ती
त्यास दंडवत घालून म्हणाली, मज परक्या स्त्रीवर आपण
कृपादृष्टि करून माझा समाचार घेतला याचें काय
कारण बरें? ११ बवाज तिला म्हणाला, तुझा पति
मेल्यापासून तूं आपल्या सासूशीं कशी वागलीस व तूं
कशा प्रकारें आपलीं मातापितरें व जन्मभूमि सोडून
तुला अपरिचित अशा लोकांत आलीस, ही सविस्तर
हकीकत मला समजली आहे. १२ परमेश्वर तुझ्या
कृतींचें तुला फळ देवो; इस्राएलाचा देव परमेश्वर
याच्या पंखांखालीं तूं आश्रयास आली आहेस, तो
तुला पुरें पारितोषिक देवो. १३ ती म्हणाली, महाराज,
आपली कृपादृष्टि मजवर राहूं द्यावी; मी आपल्या कोण-
त्याहि दासीच्या बरोबरीची नसून आपण मजशीं ममतेनें
बोलून माझें समाधान केलें आहे. १४ भोजनाच्या
वेळीं बवाज तिला म्हणाला, इकडे ये, भाकर
खा; या कढींत आपली भाकर बुडीव. त्या कापणी
करणाऱ्यांच्या पंक्तीस ती बसली व त्यांनीं तिला हुरडा
दिला; तो तिनें पोटभर खाल्ल्यावर कांहीं शिल्लक राहिला.
१५ ती सरवा वेचावयास निघाली तेव्हां बवाजानें
आपल्या गड्यांस सांगितलें, तिला पेंढ्यांत वेचूं द्या, मना
करूं नका; १६ आणि चालतां चालतां पेंढ्यांतून
मूठमूठ टाकीत जा; तिला वेचूं द्या, तिला धमकावूं नका.
१७ तिनें या प्रकारें संध्याकाळपर्यंत सरवा वेचला.
तिनें वेचून आणिलेला सरवा झोडिला त्याचे एफाभर सातू
निघाले. १८ ते घेऊन ती नगरांत गेली; तिनें काय
वेचून आणिलें तें तिच्या सासूनें पाहिलें; तसेंच तिनें
पुरें इतकें खाऊन उरलेलें आणिलें होतें तेंहि तिला
दिलें. १९ तिच्या सासूनें तिला विचारिलें, आज तूं कोठें
सरवा वेचिला? हे श्रम तूं कोठें केलेस? ज्यानें तुझा
समाचार घेतला त्याचें कल्याण होवो. मग आपण
कोणाच्या शेतांत काम केलें तें तिनें आपल्या सासूला
सांगितलें; ती म्हणाली, ज्या माणसाच्या शेतांत आज
मीं काम केलें त्याचें नांव बवाज. २० नामी आपल्या
सुनेस म्हणाली, ज्या परमेश्वरानें जीवंतांवर व मृतांवरहि
आपली दया करावयाचें सोडिलें नाहीं, तो त्याचें
कल्याण करो. नामी तिला आणखी म्हणाली, हा माणूस
आपल्या आप्तांपैकीं आहे, एवढेंच नव्हे तर आपलें
वतन सोडविण्याचा त्यास हक्क आहे. २१ मग मवाबी
रूथेनें सांगितलें कीं तो मला असेंहि बोलला कीं माझे
गडी सर्व कापणी करीत तोंपर्यंत त्यांच्या मागोमाग
राहा. २२ नामी आपली सून रूथ हिला म्हणाली,
मुली, तूं त्याच्याच नोकरिणींबरोबर जावें,
इतरांच्या शेतांत तूं लोकांस आढळूं नये हें बरें.
२३ या प्रकारें सातूच्या आणि गव्हाचा हंगाम
संपेपर्यंत तिनें बवाजाच्या नोकरिणींबरोबर सरवा
वेचिला; आणि ती आपल्या सासूबरोबर राहिली.

## ३

१ तिची सासू नामी तिला म्हणाली, तुझें
कल्याण व्हावें म्हणून तुजसाठीं एखादें स्थळ मला
पाहावयास नको काय? २ तर हें पाहा, ज्याच्या
नोकरिणींबरोबर तूं राहिलीस तो बवाज आपला आप्त
नव्हे काय? तो आज रात्रीं खळ्यांत सातू उफणणार
आहे. ३ तर तूं न्हाणमाखण कर व चांगलीं वस्त्रें लेऊन
खळ्यांत जा, पण त्याचें खाणेंपिणें संपेपर्यंत त्याच्या
नजरेस पडूं नको. ४ तो कोठें निजतो तें पाहून ठेव
आणि तो निजला म्हणजे तूं जाऊन त्याच्या पायांवरचें

पांघरूण काढून तेथें निजून जा; मग काय करावयाचें तें
तोच तुला सांगेल. ५ ती म्हणाली, तुम्ही सांगतां तें
सगळें मी करीन. ६ तिनें खळ्यांत गेल्यावर आपल्या
सासूच्या सांगीप्रमाणें सर्व कांहीं केलें. ७ खाणेंपिणें
आटोपल्यावर त्याचें चित्त प्रसन्न होऊन तो जाऊन
धान्याच्या राशीच्या कडेशीं निजला; मग ती गपचूप
जाऊन त्याच्या पायांवरचें पांघरूण काढून तेथें निजली.
८ मध्यरात्र उलटल्यावर तो मनुष्य दचकून जागा
झाला आणि वर डोकें करून पाहतो तों आपल्या
पायांपाशीं कोणी स्त्री निजलेली आहे असें त्याच्या
दृष्टीस पडलें. ९ तेव्हां तो तिला म्हणाला, तूं कोण
आहेस? ती म्हणाली, मी आपली दासी रूथ आहें; या
आपल्या दासीला आपल्या पांघरुणाखालीं घ्या; कारण
आमचें वतन सोडविण्याचा हक्क आपल्याला आहे. १० तो
म्हणाला, मुली, परमेश्वर तुझें कल्याण करो, तूं पहिल्या-
पेक्षां दुसऱ्या खेपेस अधिक प्रेमळपणा दाखविलास;
कारण श्रीमंत किंवा गरीब अशा कोणाहि तरुण पुरुषाच्या
नादीं तूं लागली नाहींस. ११ तर मुली, भिऊं नको;
तूं म्हणतेस तसें मी तुझ्यासंबंधानें करीन; कारण माझ्या
गांवच्या सर्व लोकांस ठाऊक आहे कीं तूं सद्गुणी
स्त्री आहेस. १२ मी तुझें वतन सोडवावयाजोगा
जवळचा आप्त आहें खरा, तथापि माझ्याहूनहि जवळचा
आणखी एक आप्त आहे. १३ तूं रात्रभर येथें राहा,
आणि सकाळीं तो तुजसंबंधानें आप्तकर्तव्य करण्यास
तयार झाला तर बरेंच; त्याला तें करूं दे; पण तुझ्या-
संबंधानें आप्तकर्तव्य करण्यास तो कबूल झाला नाहीं
तर, परमेश्वराच्या जीविताची शपथ, मी तें करीन;
सकाळपर्यंत निजून राहा. १४ ती त्याच्या पायांशीं
पहाट होईपर्यंत निजून राहिली, आणि मनुष्य मनुष्याला
ओळखतां येण्यापूर्वी ती उठली; कारण बवाजानें तिला
सांगितलें होतें कीं खळ्यांत कोणी स्त्री आली होती हें
कोणाला कळतां कामा नये. १५ तो तिला म्हणाला,
तुझ्या अंगावरची चादर आणून पसरून धर; तिनें
ती पसरल्यावर त्यानें सहा मापें सातू मापून तिच्या
पदरांत टाकिले व तिच्या खांद्यावर ठेवले; मग
तो[1] गांवांत गेला. १६ सासूकडे ती आली तेव्हां ती तिला
म्हणाली, माझ्या मुली, कसें काय झालें? तेव्हां त्या
माणसानें कायकाय केलें तें तिनें तिला सगळें सांगितलें.
१७ तिनें सांगितलें कीं सहा मापें सातू त्यानें मला
दिले; तो म्हणाला, आपल्या सासूकडे रिकाम्या हातीं
जाऊं नको. १८ ती म्हणाली, मुली, या गोष्टींचा
कसा काय परिणाम होतो हें समजेपर्यंत तूं स्वस्थ
राहा; कारण आज तो मनुष्य ह्या गोष्टीचा शेवट
लाविल्याशिवाय राहावयाचा नाहीं.

४ १ इकडे बवाज वेशींत जाऊन बसला;
इतक्यांत बवाज ज्या जवळच्या आप्ताविषयीं
बोलला होता तोहि तेथें आला; तेव्हां हा म्हणाला,
अरे गृहस्था, येथें येऊन बैस; तेव्हां तो जाऊन तेथें
बसला. २ मग गांवांतील दहा वडील पुरुषांस बोलावून
त्यांस तो म्हणाला, तुम्ही इकडे येऊन बसा; आणि तेहि
बसले. ३ मग तो त्या जवळच्या आप्तास म्हणाला,
मवाब देशाहून नामी आली आहे; ती तुझा-माझा बांधव
अलीमलेख याच्या शेताचा वतनभाग विकीत आहे;
४ तर मला वाटतें कीं तुझ्या कानावर ही गोष्ट
घालावी, आणि येथें बसलेले लोक व माझ्या लोकांचे
वडील जन यांच्यासमक्ष तूं ती जमीन खरेदी करावी.
तुला ती सोडवावयाची असली तर सोडीव; ती
सोडवावयाची नसली तर तसें सांग म्हणजे
मला समजेल; कारण ती सोडविणारा तुझ्यावांचून
दुसरा कोणी इतका जवळचा आप्त नाहीं; तुझ्यामागून
माझा हक्क आहे. तो म्हणाला, मी ती सोडवितों.
५ बवाज म्हणाला, ती जमीन ज्या दिवशीं तूं नामीच्या
हातून विकत घेशील त्या दिवशीं मृताची स्त्री
मवाबी रूथ हिच्या हातूनहि ती तुला विकत घ्यावी
लागेल; यासाठीं कीं मयताचें नांव त्या वतनाला कायम
राहावें. ६ तेव्हां तो जवळचा आप्त म्हणाला, मला तें
वतन सोडवितां येत नाहीं; कारण तसें केलें तर माझ्या
वतनाचा बिघाड व्हावयाचा; तर माझा सोडवि-
ण्याचा हक्क तूं घे, कारण माझ्यानें तें सोडवत

१ पाठभेद, ती गांवांत गेली.

नाहीं. ७ वतन सोडविणें व त्याची अदलाबदल करणें
हे व्यवहार पक्के करण्याची इस्राएल लोकांत प्राचीन
काळीं अशी वहिवाट होती कीं मनुष्य आपलें पायतण
काढून दुसऱ्यास देत असे; प्रमाण पटविण्याची इस्राएल
लोकांत हीच चाल होती. ८ तो जवळचा आप्त
बवाजास म्हणाला, तूंच तें वतन संपादन करून घे. मग
त्यानें आपलें पायतण काढिलें. ९ बवाज त्या वडील
मंडळांस व सर्व लोकांस म्हणाला, आज तुम्ही साक्षी
आहां कीं जें कांहीं अलीमलेखाचें आणि खिल्योन व
महलोन यांचें होतें तें सर्व मी नामीच्या हातून
घेतलें आहे. १० याखेरीज महलोनाची स्त्री मवाबी
रूथ माझी बायको व्हावी म्हणून मी तिचें
संपादन करीत आहे; तें यासाठीं कीं मयताचें नांव
त्याच्या वतनांत कायम राहावें, मृताचें नांव त्याच्या
भाऊबंदांतून व त्याच्या गांवच्या वेशींतून नष्ट होऊं
नये; याविषयीं तुम्ही आज साक्षी आहां. ११ तेव्हां
वेशींतले सगळे लोक व वडील जन म्हणाले, आम्ही
साक्षी आहों; ही जी स्त्री तुझ्या गृहीं येत आहे तिचें
परमेश्वर इस्राएल घराण्याची स्थापना करणाऱ्या राहेल
व लेआ यांच्यासारखें करो; एफ्राथा येथें तूं मोठा
कर्ता पुरुष हो; बेथलहेमांत तुझी प्रख्याति होवो;
१२ आणि तामारेच्या पोटीं यहूदापासून झालेल्या
पेरेसाच्या घराण्यासारखें तुझें घराणें या नववधूच्या पोटीं
परमेश्वर जें संतान देईल त्याच्यायोगें होवो. १३ मग
बवाजानें रूथेशीं लग्न केलें व ती त्याची स्त्री झाली. तो
तिजपाशीं गेला तेव्हां परमेश्वराच्या दयेनें तिच्या पोटीं
गर्भ राहून तिला पुत्र झाला. १४ तेव्हां स्त्रिया नामीस
म्हणाल्या, परमेश्वर धन्य आहे, त्यानें तुला तुझें वतन
सोडविणाऱ्या जवळच्या आप्ताविरहित ठेविलें नाहीं;
त्याचें नांव इस्राएलांत प्रख्यात होवो. १५ हा तुझें पुनरु-
ज्जीवन करणारा व वृद्धापकाळीं तुझा प्रतिपाळ करणारा
होवो; कारण तुझी सून जी तुजवर प्रीति करते व जी
तुला सात पुत्रांहून अधिक आहे तिला हा पुत्र झाला
आहे. १६ मग नामीनें तें मूल उचलून आपल्या उराशीं
धरिलें व ती त्याची दाई बनली. १७ नामीला
पुत्र झाला असें म्हणून शेजारणींनीं त्याचें नांव
ओबेद असें ठेविलें. तो इशायाचा बाप व दाविदाचा
आजा होय.

१८ पेरेसाची वंशावळ ही: पेरेसाला हेस्रोन
झाला, १९ हेस्रोनास राम झाला, रामास अम्मीना-
दाब झाला, २० अम्मीनादाबास नहशोन झाला,
नहशोनास सल्मोन झाला, २१ सल्मोनास बवाज
झाला, बवाजास ओबेद झाला, २२ ओबेदास इशाय
झाला आणि इशायास दावीद झाला.

# १ शमुवेल



१ एफ्राइमाच्या डोंगराळ प्रदेशांतील रामाथा-
**१** ईम-सोफीम नामक नगराचा रहिवासी एक पुरुष
होता, त्याचें नांव एलकाना बिन यरोहाम बिन
एलीहू बिन तोहू बिन सूफ एफ्राइमी असें होतें.
२ त्यास दोन बायका होत्या. एकीचें नांव हन्ना व
दुसरीचें नांव पनिन्ना; पनिन्नेस मुलेंबाळें झालीं होतीं,
पण हन्नेस कांहीं अपत्य नव्हतें. ३ हा पुरुष दर वर्षी
आपल्या नगराहून सैन्यांचा देव परमेश्वर याची
आराधना करण्यास व होमबलि अर्पिण्यास शिलो येथें
जात असे. एलीचे दोन पुत्र हफनी व फिनहास हे
परमेश्वराचे याजक तेथें असत. ४ एलकाना यज्ञ करी
तेव्हां तो आपली स्त्री पनिन्ना हिला व तिच्या सर्व
पुत्रांस व कन्यांस वांटे देत असे. ५ हन्नेस तो
दुप्पट वांटा देई; कारण तिच्यावर त्याची प्रीति असे;
परंतु परमेश्वरानें तिची कूस बंद केली होती. ६ परमे-
श्वरानें तिची कूस बंद केली हें पाहून तिची सवत

तिला मनस्वी चिडवी, तेणेंकरून ती कुढत राही.
७ शिलोस जाण्याचा त्याचा हा परिपाठ वर्षानुवर्ष
होता, आणि हन्ना परमेश्वराच्या मंदिरीं गेली म्हणजे
पनिन्ना तिला चिडवीत असे; तेव्हां ती रडे व कांहीं
खात नसे. ८ तिचा पति एल्काना तिला एकदां
म्हणाला, हन्ना, तूं कां रडतेस? तूं अन्नपाणी कां
वर्जिलें? तुझें हृदय खिन्न कां? मी तुला दहा पुत्रांपेक्षां
अधिक नाहीं काय? ९ शिलो येथें त्यांचें खाणेंपिणें
आटोपल्यावर हन्ना उठून गेली. त्या प्रसंगीं परमेश्वर-
मंदिराच्या द्वाराच्या बाजूस एली याजक आपल्या
आसनावर बसला होता. १० तिचें मन व्यथित झाल्यामुळें
ती परमेश्वराची करुणा भाकून ढळढळां रडली. ११ ती
म्हणाली, हे सेनाधीश परमेश्वरा, तूं आपल्या ह्या
दासीच्या दुःखाकडे खरोखर अवलोकन करिशील,
माझी आठवण करिशील, आपल्या दासीला विसरणार
नाहींस, आपल्या दासीला पुत्रसंतान देशील, तर तो
आयुष्यभर परमेश्वराचा व्हावा एतदर्थ मी त्यास
समर्पण करीन; त्याच्या डोक्यावर वस्तरा फिरविणार
नाहीं; असा तिनें नवस केला. १२ परमेश्वरापुढें ती
अशी करुणा भाकीत असतां एली तिच्या मुखाकडे
पाहत होता. १३ हन्ना मनांतल्या मनांत बोलत होती,
तिचे ओंठ हालत होते; पण तिचा शब्द ऐकूं येत
नव्हता; म्हणून एलीस वाटलें कीं ही दारूच्या निशेंत
असावी. १४ एली तिला म्हणाला, तूं अशी कोठवर
निशेंत राहणार? तूं ह्या आपल्या द्राक्षारसाच्या निशेंतून
मुक्त हो. १५ हन्ना त्यास म्हणाली, माझे स्वामी, मी
दुःखित हृदयाची स्त्री आहें; मीं द्राक्षारसाचें किंवा दारूचें
सेवन केलेलें नाहीं; मी परमेश्वरासमोर मन मोकळें
करून बोलत होतें. १६ मी आपली दासी कोणी अधम स्त्री
आहे असें समजूं नका; मला चिंता व क्लेश मनस्वी झाल्या-
मुळें मी एवढा वेळ बोलत होते. १७ तेव्हां एली
तिला म्हणाला, तूं सुखानें जा; इस्राएलाच्या देवाकडे
जें मागणें तूं केलें आहे तें तो देवो. १८ ती
म्हणाली, ह्या आपल्या दासीवर आपली कृपादृष्टि होवो.
मग त्या स्त्रीनें परत जाऊन अन्न सेवन केलें, व यानंतर
तिचा चेहरा उदास राहिला नाहीं. १९ ती मंडळी
अगदीं पहाटेस उठून परमेश्वराला वंदन करून रामा
येथें आपल्या घरीं परत गेली; मग एल्कानानें
आपल्या स्त्रीस जाणिलें आणि परमेश्वरानें तिची
आठवण केली. २० या प्रकारें हन्ना गर्भवती झाली व
दिवस पुरे होऊन तिला पुत्र झाला; हा परमेश्वराला
मागितला असें म्हणून तिनें त्याचें नांव शमुवेल
असें ठेविलें. २१ मग एल्काना परमेश्वराला आपले
वार्षिक होमबलि अर्पिण्यास व नवस फेडण्यास
आपल्या सगळ्या परिवारासह गेला. २२ हन्ना तेवढी
गेली नाहीं; ती आपल्या पतीस म्हणाली, बालकाचें
दूध तुटेपर्यंत मी थांबतें. मग मी त्यास घेऊन जाईन
म्हणजे तो परमेश्वरासमोर हजर होऊन तेथें निरंतर
राहील. २३ तिचा नवरा एल्काना तिला म्हणाला, तुला
बरें वाटेल तसें कर; तूं त्याचें दूध तोडीपर्यंत येथेंच
राहा; परमेश्वर आपलें वचन पुरें करो म्हणजे झालें.
तेव्हां ती स्त्री राहिली, आणि त्याचें दूध तुटेपर्यंत तिनें
त्याला स्तनपान दिलें. २४ त्याचें दूध तोडिल्यावर ती
त्यास घेऊन गेली; तिनें तीन गोऱ्हे, एक एफाभर
सपीठ, एक बुधलाभर द्राक्षारस बरोबर घेतला आणि
ती शिलो येथें परमेश्वराच्या मंदिरीं मुलास घेऊन गेली;
तो त्या वेळीं केवळ बालक होता. २५ त्यांनीं गोऱ्हा बळी
दिला आणि त्या बालकास एलीकडे नेलें. २६ तेव्हां
हन्ना म्हणाली, माझे स्वामी, आपल्या जीविताची
शपथ, माझे स्वामी, जी स्त्री आपल्याजवळ एथें उभी
राहून परमेश्वराची प्रार्थना करीत होती तीच स्त्री मी
आहें. २७ याच बालकासाठीं मी प्रार्थना करीत होतें.
परमेश्वराकडे जें मागणें मीं केलें तें त्यानें मला दिलें
आहे. २८ तसेंच मीहि या बालकास परमेश्वराच्या
स्वाधीन केलें आहे, तो परमेश्वरास आमरण दिला आहे.
तेव्हां एल्कानानें तेथें परमेश्वराची आराधना केली.

१ हन्ना हिनें प्रार्थना केली ती ही:
२ परमेश्वराच्या ठायीं माझें हृदय उल्लासत आहे;
परमेश्वराच्या ठायीं माझें शृंग उन्नत झालें आहे;
माझें मुख माझ्या शत्रूंविरुद्ध उघडलें आहे;

कारण तूं केलेल्या उद्धारानें मला आनंद होत आहे.
२ परमेश्वरासारखा पवित्र कोणी नाहीं;
कारण तुझ्याशिवाय कोणी नाहींच;
आमच्या देवासारखा दुर्ग कोणी नाहीं.
३ गर्वानें एवढें फुगून आतां बोलूं नका;
तुमच्या मुखांतून उन्मत्तपणाचें भाषण न निघो;
कारण परमेश्वर ज्ञाता देव आहे;
तो सर्व कृति तोलून पाहतो.
४ शूर वीरांचीं धनुष्यें भंगून गेलीं आहेत,
जे लटपटत होते त्यांच्या कमरेस बलरूप कमरबंद चढविला आहे.
५ जे पोटभर खात होते ते अन्नासाठीं मोलमजुरी करीत आहेत;
जे क्षुधित होते त्यांस आतां आराम प्राप्त झाला आहे;
वंध्येला सात मुलें झालीं आहेत;
बहुपुत्रवती क्षीण झाली आहे.
६ परमेश्वर प्राण हरण करितो आणि प्राणदानहि करितो;
तो खालीं अधोलोकीं नेतो आणि तो वरहि आणतो.
७ परमेश्वर निर्धन करितो व धनवान्‌हि करितो;
तो अवनत करितो व उन्नतहि करितो.
८ तो कंगालांस धुळींतून उठवितो,
दरिद्र्यांस उकिरड्यावरून उचलून उभे करितो,
म्हणजे मग ते सरदारांच्या शेजारीं बसतात,
आणि वैभवी सिंहासन त्यांस प्राप्त होतें;
कारण पृथ्वीचे आधारस्तंभ परमेश्वराच्या हातचे आहेत,
त्यांवर त्यानें दुनिया ठेविली आहे.
९ तो आपल्या भक्तांचीं पावलें संभाळील,
पण दुष्ट अंधारांत स्तब्ध पडून राहतील;
कारण कोणीहि मानव आपल्याच बलानें विजयी होणार नाहीं.
१० परमेश्वराशीं झगडणाऱ्यांचा चुराडा होईल,
तो त्यांच्यावर आकाशांतून गर्जेल;
परमेश्वर पृथ्वीच्या दिगंतापर्यंत न्याय करील;
तो आपल्या राजास बल देईल,
तो आपल्या अभिषिक्ताचें शृंग उन्नत करील.

११ नंतर एलकाना रामा येथें आपल्या घरीं गेला
आणि तो बालक एली याजकाच्या नजरेखालीं परमे-
श्वराची सेवा करूं लागला.

१२ एलीचे पुत्र अधम होते; त्यांना परमेश्वराची
ओळख नव्हती. १३ लोकांसंबंधानें याजकांची वहि-
वाट अशी होती कीं कोणी मनुष्य होमबलि अर्पिण्यास
आला तर मांस शिजत असतां याजकाचा चाकर हातीं
त्रिशूळ घेऊन तेथें येई, १४ आणि परातींत, गंगाळांत,
कढईंत अथवा तपेल्यांत त्रिशूळ मारून जितकें
मांस त्यास लागे तितकें याजक स्वतःसाठीं घेई.
शिलो येथें जे इस्राएल लोक येत त्यांच्याशीं ते असाच
व्यवहार करीत. १५ वपेचें हवन करण्यापूर्वींच
याजकाचा चाकर येऊन यज्ञकर्त्यास म्हणत असे,
भाजावयासाठीं याजकास मांस दे, तो तुजपासून
शिजलेलें मांस घ्यावयाचा नाहीं, तर कच्चेंच घेईल.
१६ पहिल्यानें वपेचें हवन होईल, मग तुला वाटेल
तितकें घे, असें जर यज्ञकर्ता त्यास म्हणाला तर तो
म्हणे, नाहीं, आतां दे, नाहीं तर मी जबरीनें घेईन.
१७ हें त्या तरुणांचें पाप परमेश्वराच्या दृष्टीनें फार
घोर होतें; कारण त्यामुळें लोकांना परमेश्वरासाठीं
अर्पण आणण्याचा वीट आला.

१८ शमुवेल बाळ सणाचें एफोद धारण करून
परमेश्वराची सेवा करीत असे. १९ त्याची आई
त्याच्यासाठीं एक लहानसा झगा तयार करी आणि दर
वर्षीं आपल्या पतीबरोबर वार्षिक यज्ञ करावयास येई
त्या वेळीं त्याला तो देत असे. २० एलीनें एलकाना व
त्याची स्त्री यांस असा आशीर्वाद दिला कीं तुम्हीं
मागून घेतलेला परमेश्वराच्या स्वाधीन केला त्याबद्दल
परमेश्वर तुला या स्त्रीपासून संतति देवो. मग तीं
उभयतां आपल्या घरीं गेलीं; २१ आणि परमेश्वरानें
हन्नेवर अनुग्रह केला व ती गर्भवती होऊन तिला

तीन पुत्र व दोन कन्या झाल्या. इकडे शमुवेल बाळ
परमेश्वरासमोर वाढत गेला.
२२ एली फार वृद्ध झाला होता; त्याच्या पुत्रांनीं
सगळ्या इस्राएल लोकांशीं कसकसा व्यवहार केला आणि
दर्शनमंडपाच्या दाराशीं सेवा करीत असलेल्या स्त्रियांशीं
त्यांनीं कसें कुकर्म केलें हें सर्व त्याच्या कानावर आलें.
२३ तेव्हां तो त्यांस म्हणाला, तुम्ही असलीं कर्में कां
करितां? तुमचीं कुकर्में या सर्व लोकांकडून माझ्या
कानीं आलीं आहेत. २४ माझ्या मुलांनो, असें करूं
नका; माझ्या कानावर जो बोभाटा येत आहे तो कांहीं
ठीक नाहीं; तुम्ही परमेश्वराच्या प्रजेकडून पातक करवीत
आहां; २५ कोणीं मनुष्यानें दुसऱ्या मनुष्याचा अपराध
केला तर न्यायाधीश त्याचा न्याय निवडील, पण कोणीं
परमेश्वराविरुद्ध पातक केलें तर त्याची वकिली कोण
करील? तरी पण ते आपल्या पित्याचा शब्द ऐकतना,
कारण देवाला त्यांस मारून टाकावयाचें होतें. २६ इकडे
शमुवेल बाळ हा वाढत गेला; परमेश्वर व मानव त्याच्या-
वर प्रसन्न होते.
२७ मग देवाचा एक मनुष्य एलीकडे जाऊन म्हणाला,
परमेश्वर असें म्हणतो, तुझ्या मूळ पुरुषाचें कुटुंब
मिसरांत फारोच्या घरीं दास्य करीत होतें तेव्हां त्यास
मी प्रगट झालों होतों कीं नाहीं? २८ तसेंच त्यानें माझा
याजक व्हावें, माझ्या वेदीवर यज्ञ करावे, धूप जाळावा
आणि माझ्यासमोर एफोद ल्यावें म्हणून इस्राएलाच्या
सर्व वंशांतून त्यास मीं निवडून नेमिलें होतें कीं नाहीं?
आणखी तुझ्या मूळपुरुषाच्या घराण्यास इस्राएल लोकांचीं
सर्व हव्यें मीं दिलीं कीं नाहीं? २९ माझ्या मंदिरीं जीं
होमार्पणें व अन्नार्पणें अर्पिण्याची मीं आज्ञा दिली आहे
त्यांस तुम्ही कां लाथ मारितां? आणि माझे लोक इस्रा-
एल यांनीं केलेल्या अर्पणांपैकीं सर्वोत्तम अर्पणें खाऊन
तुम्हीं लठ्ठ व्हावें म्हणून तूं आपल्या पुत्रांचा माझ्याहून
अधिक आदर कां करीत आहेस? ३० यास्तव इस्रा-
एलाचा देव परमेश्वर म्हणतो, तुझें घराणें व तुझ्या
बापाचें घराणें मजसमोर निरंतर चालू राहील असें
मीं म्हटलें होतें खरें, पण आतां परमेश्वर म्हणतो, असें
माझ्या हातून न घडो; कारण जे माझा आदर
करितात त्यांचा मी आदर करीन आणि जे मला
तुच्छ मानतात त्यांचा अवमान होईल. ३१ पाहा, मी
तुझा बाहु व तुझ्या पितृकुळांचा बाहु उच्छेदीन, व
तुझ्या घरीं कोणीहि वृद्ध माणूस सांपडावयाचा नाहीं,
असे दिवस येत आहेत. ३२ देवानें इस्राएल लोकांचा
कितीहि उत्कर्ष केला तरी माझ्या घरादाराची दुर्दशा तूं
आपल्या डोळ्यांनीं पाहशील; तुझ्या घराण्यांत कोणीहि
म्हातारपण पाहणार नाहीं. ३३ तुझे डोळे क्षीण होतील
व तुझें मन शोकाकुल होईल; तरी पण तुझ्या कुळां-
तील सर्वच पुरुषांचा उच्छेद करून त्यांस मी आपल्या
वेदीपासून दूर करणार नाहीं; तुझ्या घरीं उत्पन्न होतील
तेवढे पुरुष भरज्वानींत मरतील. ३४ तुझे दोघे पुत्र
हफनी व फिनहास यांजवर अरिष्ट येईल, हाच तुला
इशारा होईल; ते दोघेहि एकाच दिवशीं मृत्यु पावतील;
३५ आणि मी आपल्यासाठीं एक विश्वासू याजक निर्माण
करीन; तो माझ्या चित्तीं व माझ्या मनीं जें आहे त्या-
प्रमाणें वर्तेल; मी त्याचें घराणें कायमचें स्थापीन आणि
तो माझ्या अभिषिक्तासमोर निरंतर वर्तेल. ३६ तुझ्या
घराण्यांतला जो कोणी वांचून राहील तो चवलीपावली-
साठीं व कोरभर भाकरीसाठीं त्याजपाशीं जाऊन
त्याला दंडवत घालील व म्हणेल कीं याजकपणाचें
कोणतें तरी काम मला द्या म्हणजे मला घासभर
अन्न मिळेल.

३ १ शमुवेल बाळ एलीसमक्ष परमेश्वराची सेवा
करीत असे. त्या काळीं परमेश्वराचें वचन दुर्लभ
झालें होतें; त्याचे दृष्टांत प्रायः होत नसत. २ त्या
समयीं एकदां असें झालें कीं एली आपल्या ठिकाणीं
निजला होता, (त्याची दृष्टि मंद होऊं लागली होती
म्हणून त्यास दिसत नव्हतें,) ३ देवाचा दीप अजून
मालवला नव्हता, आणि शमुवेल परमेश्वराच्या
मंदिरांत जेथें देवाचा कोश होता तेथें निजला होता.
४ तेव्हां परमेश्वरानें शमुवेलास हाक मारिली; तो
म्हणाला, काय आज्ञा? ५ मग तो एलीकडे धावत
जाऊन म्हणाला, काय आज्ञा? तुम्हीं मला हाक मारिली.

तो म्हणाला, मीं हाक मारिली नाहीं; परत
जाऊन नीज; त्यावरून तो परत जाऊन निजला.
६ पुनः परमेश्वरानें शमुवेला, शमुवेला, अशी हाक
मारिली. तेव्हां शमुवेल उठून एलीकडे जाऊन म्हणाला,
काय आज्ञा ? मला तुम्हीं हाक मारिली. तो म्हणाला,
मुला, मीं तुला हाक मारिली नाहीं; परत जाऊन
नीज. ७ अद्यापि शमुवेलास परमेश्वराची ओळख
झाली नव्हती, आणि परमेश्वराचा आदेश त्यास
झाला नव्हता. ८ परमेश्वरानें शमुवेलास तिसऱ्यानें
हाक मारिली, तेव्हां तो उठून एलीकडे गेला आणि
म्हणाला, काय आज्ञा ? तुम्हीं मला हाक मारिली. पर-
मेश्वर त्या बालकास हाक मारीत आहे असें एली
आतां समजला. ९ तेव्हां एली शमुवेलास म्हणाला,
जाऊन नीज, आणि त्यानें पुनः हाक मारिली तर म्हण,
हे परमेश्वरा, बोल, तुझा दास ऐकत आहे. मग शमु-
वेल जाऊन आपल्या जागीं निजला. १० तेव्हां पर-
मेश्वर येऊन उभा राहिला, आणि पहिल्याप्रमाणें,
शमुवेला, शमुवेला, अशी त्यानें हाक मारिली, तेव्हां
शमुवेल म्हणाला, बोल, तुझा दास ऐकत आहे.
११ परमेश्वर शमुवेलास म्हणाला, पाहा, मी इस्राएलांत
अशी एक गोष्ट करणार आहें कीं ती जो कोणी
ऐकेल त्याचे दोन्ही कान भणभणतील. १२ एलीच्या
घराण्याविषयीं जें कांहीं मी बोललों आहें तें सर्व अथ-
पासून इतिपर्यंत त्या दिवशीं मी पुरें करीन. १३ मीं
त्यास सांगितलें आहे कीं त्याला ठाऊक असलेल्या
अधर्मास्तव मी त्याच्या घराण्याचें कायमचें पारिपत्य
करीन, कारण त्याचे पुत्र स्वतःस शापग्रस्त करीत
असतां त्यानें त्यांस आवरिलें नाहीं. १४ यास्तव मीं
एलीच्या घराण्याविषयीं अशी शपथ केली आहे कीं
एलीच्या घराण्याच्या पातकाचें क्षालन यज्ञ व अर्पण
यांनीं कदापि व्हावयाचें नाहीं. १५ मग शमुवेल सकाळ-
पर्यंत निजून राहिला; सकाळीं त्यानें परमेश्वराच्या
मंदिराचीं कवाडें उघडिलीं. हा दृष्टांत एलीस कळविण्याचें
शमुवेलास भय वाटलें. १६ एलीनें शमुवेलास हाक
मारून म्हटलें, मुला, शमुवेला, तेव्हां तो म्हणाला,
काय आज्ञा ? १७ तो म्हणाला, परमेश्वरानें तुला
गोष्ट सांगितली ती कोणती ? मजपासून ती लपवूं
नको; तुला जें कांहीं तो बोलला आहे त्यांतलें कांहीं-
एक तूं छपवून ठेविशील तर देव तुझें तसें किंब-
हुना अधिक शासन करो. १८ शमुवेलानें त्यास सर्व
कांहीं सांगितलें, त्याजपासून कांहीं छपविलें नाहीं. मग
तो म्हणाला, परमेश्वरच तो, त्याला जसें बरें वाटेल
तसें तो करो. १९ शमुवेल वाढत गेला; परमेश्वर
त्याच्यासमागमें असे व त्याचें कोणतेंहि वचन त्यानें
वायां जाऊं दिलें नाहीं. २० दानापासून बैर-शेबा-
पर्यंत राहणाऱ्या सर्व इस्राएल लोकांस विदित झालें
कीं शमुवेल हा परमेश्वराचा संदेष्टा व्हावयाचा ठरला
आहे. २१ परमेश्वरानें शिलोंत पुनः दर्शन दिलें, म्हणजे
परमेश्वर आपल्या वचनाच्या द्वारें शमुवेलास प्रगट
झाला. १ शमुवेलाची ही हकीकत सर्व इस्राएलांत
४ पसरली.
यानंतर इस्राएल लोक पलिष्ट्यांशीं लढण्यास
निघाले; त्यांनीं एबन-एजर येथें तळ दिला, आणि पलिष्ट्यां-
नीं अफेक येथें तळ दिला, २ पलिष्ट्यांनीं इस्राएलाशीं
सामना करण्यासाठीं व्यूहरचना केली; लढाईस तोंड
लागून पलिष्ट्यांपुढें इस्राएल लोक पराभव पावले;
व त्यांनीं त्यांच्या सेनेपैकीं सुमारें चार हजार पुरुषांची
रणांगणांत कत्तल केली. ३ लोक छावणींत परत आले
तेव्हां इस्राएलाचे वडील जन म्हणूं लागले, परमेश्वरानें
आज आमचा पलिष्ट्यांकडून पराभव कां होऊं दिला ?
तर परमेश्वराच्या कराराचा कोश शिलोहून आपण
आणूं या; तो आपल्यामध्यें आला तर शत्रूंच्या हातां-
तून आपला बचाव होईल. ४ तेव्हां लोकांनीं
शिलोस माणसें पाठवून तेथून सेनाधीश परमेश्वर जो
करूबारूढ असतो त्याच्या कराराचा कोश आणविला;
देवाच्या कराराच्या कोशाबरोबर एलीचे दोघे पुत्र
हफनी व फिनहास हे होते. ५ परमेश्वराच्या कराराचा
कोश छावणींत आला तेव्हां सर्व इस्राएलांनीं एवढा
जयघोष केला कीं त्यानें भूमि दणाणली. ६ हा जय-
घोष ऐकून पलिष्टी म्हणूं लागले, इब्र्यांच्या छावणींत

हा एवढा जयघोष कशाचा असावा ? मग त्यांस
कळून आलें कीं परमेश्वराच्या कराराचा कोश छावणींत
आला आहे. ७ तेव्हां पलिष्टी भयभीत होऊन म्हणाले,
देव छावणींत आला आहे; हाय, हाय, आतां आमचें
काय होईल ! अशी गोष्ट पूर्वी कधीं झाली नव्हती.
८ हाय, हाय, आतां आमचें काय होईल ! अशा प्रतापी
देवांच्या हातून आमची सुटका कोण करणार ! ज्यांनीं
रानांत मिसरी लोकांस तऱ्हतऱ्हेच्या पीडांनीं पीडिलें
तेच हे देव होत. ९ तर अहो पलिष्ट्यांनो, हिंमत धरा,
मर्दांप्रमाणें वर्ता; इब्री तुमचे दास होऊन राहिले
आहेत तसे तुम्ही त्यांचे दास होऊं नका; तर
मर्दांप्रमाणें वर्ता, युद्ध करा. १० मग पलिष्टी लढले
आणि इस्राएल लोक पराभव पावून सगळे आप-
आपल्या डेऱ्यांकडे पळून गेले; त्यांची एवढी मोठी
कत्तल झाली कीं इस्राएलाचें तीस हजार पायदळ
कामास आलें. ११ परमेश्वराच्या कराराचा कोश हस्तगत
झाला, आणि एलीचे दोघे पुत्र हफनी व फिनहास
ठार झाले. १२ त्याच दिवशीं एक बन्यामिनी
मनुष्य सैन्यांतून पळ काढून शिलो येथें आला;
त्यानें आपलीं वस्त्रें फाडिलीं होतीं व डोक्यांत
धूळ घातली होती. १३ तो तेथें आला तेव्हां एली
रस्त्याच्या बाजूला आसनावर बसून वाट पाहत होता;
कारण परमेश्वराच्या कोशाच्या चिंतेमुळें त्याच्या मनाचा
थरकांप होत होता. त्या मनुष्यानें नगरांत येऊन हें
वर्तमान सांगितलें तेव्हां सगळें नगर आक्रोश करूं
लागलें. १४ या आक्रंदनाचा नाद एलीच्या कानीं
पडला तेव्हां हा हलकल्लोळ कसला म्हणून त्यानें
विचारलें, तेव्हां त्या मनुष्यानें धावत येऊन त्याला
तें वर्तमान सांगितलें. १५ एली त्या समयीं अठ्याण्णव
वर्षांचा होता, आणि त्याची दृष्टि मंद झाल्यामुळें
त्याला दिसत नव्हतें. १६ त्या मनुष्यानें एलीस
म्हटलें, सैन्यांतून आलेला मनुष्य तो मीच; मी आज
सैन्यांतून पळून आलों आहें. तेव्हां तो त्यास
म्हणाला, मुला, काय समाचार आहे ? १७ त्या
बातमी आणणाऱ्यानें उत्तर दिलें कीं इस्राएलानें
पलिष्ट्यांपुढें पळ काढिला, लोकांची मोठी कत्तल
उडाली, हफनी व फिनहास हे आपले दोन पुत्रहि ठार
झाले आणि देवाचा कोश हस्तगत झाला. १८ देवाच्या
कोशाचें नांव त्यानें उच्चारितांच एली दरवाजाजवळील
आसनावर बसला होता, तेथेंच तो मागें पडला; तो
वृद्ध व अंगानें जड असल्यामुळें त्याची मान मोडून तो
मृत्यु पावला. तो चाळीस वर्षें इस्राएलाचा शास्ता होता.
१९ त्याची सून फिनहासाची बायको ही गरोदर
असून तिचा प्रसूतिकाळ जवळ आला होता; देवाचा
कोश नेला आणि आपला सासरा व नवरा हे मृत्यु
पावले हें वर्तमान ऐकून तिला कळा लागल्या व ती
ओणवी होऊन प्रसूत झाली. २० तिचा प्राण जातेसमयीं
ज्या स्त्रिया तिच्याभोवतीं उभ्या होत्या त्या तिला म्हणाल्या,
भिऊं नको, तुला पुत्र झाला आहे, पण ती कांहींएक
बोलली नाहीं व त्यांच्या बोलण्याकडे तिनें लक्षहि दिलें
नाहीं. २१ तिनें त्या बालकाचें नांव ईखाबोद ( वैभव
नाहीसें झालें ) असें ठेविलें; ती म्हणाली, इस्राएलाचें
वैभव नाहींसें झालें आहे; देवाचा कोश गेला आणि
आपला सासरा व पति हे मृत्यु पावले म्हणून ती
असें म्हणाली. २२ ती म्हणाली, इस्राएलाचें वैभव
गेलें आहे, कारण देवाचा कोश नेला आहे.

५ १ पलिष्ट्यांनीं देवाचा कोश घेतला तो एबन-
एजर येथून अश्दोद येथें नेला. २ पलिष्ट्यांनीं
देवाचा कोश दागोनाच्या मंदिरांत उचलून नेऊन
दागोनाजवळ ठेविला. ३ अश्दोदकर दुसऱ्या दिवशीं
पहाटेस उठून पाहतात तों दागोन परमेश्वराच्या कोशा-
पुढें जमिनीवर पालथा पडला आहे असें त्यांच्या
दृष्टीस पडलें. तेव्हां त्यांनीं दागोनास उचलून त्याच्या
जागीं पुनः ठेविलें. ४ दुसऱ्या दिवशीं पहाटेस ते उठून
पाहतात तों दागोन परमेश्वराच्या कोशापुढें जमिनीवर
पालथा पडला आहे, त्याचें शिर व दोन्ही हातांचे
तळवे तुटून उंबरठ्यावर पडले आहेत आणि त्याचें
धड तेवढें कायम राहिलें आहे असें त्यांच्या दृष्टीस
पडलें. ५ या कारणास्तव आजपर्यंत दागोनाचे पुजारी
व इतर जे कोणी दागोनाच्या मंदिरांत जातात ते

अश्दोद येथील दागोनाच्या उंबरठ्यावर पाय
ठेवीत नाहींत.
६ मग अश्दोदकरांवर परमेश्वराचा जबर हात
पडला; त्यानें त्यांचा नाश केला; त्यानें अश्दोदकर व
त्यांच्या आसपासच्या गांवांतील लोक यांस ग्रंथींच्या
व्याधीनें पीडिलें. ७ हें पाहून अश्दोदकरांनीं म्हटलें,
इस्राएलाच्या देवाचा कोश आमच्यामध्यें राहतां
कामा नये, कारण त्याचा हात आम्हांवर आणि आमचा
देव दागोन यावर जबर पडला आहे. ८ मग त्यांनीं
पलिष्टयांच्या सर्व सरदारांस बोलावणें पाठवून जमा
केलें आणि विचारिलें, आम्हीं इस्राएलाच्या देवाच्या
कोशाचें काय करावें? ते म्हणाले, इस्राएलाच्या
देवाचा कोश गथ येथें मिरवीत पोंचता करावा. तेव्हां
त्यांनीं इस्राएलाच्या देवाचा कोश गथ येथें मिरवीत
पोंचविला. ९ तो कोश तेथें मिरवीत नेल्यावर असें
झालें कीं परमेश्वराचा हात त्या नगरावर फार जबर
पडून मोठा कहर गुदरला. त्यानें त्या नगरांतील
आबालवृद्धांस पीडिलें; त्यांच्या अंगावर ग्रंथि उठल्या.
१० मग त्यांनीं देवाचा कोश एक्रोन येथें पाठविला; तो
एक्रोन येथें जाऊन पोंचतांच एक्रोनकरांनीं ओरड केली
कीं आमचा व आमच्या लोकांचा संहार करावयासाठीं
इस्राएलाच्या देवाचा कोश त्यांनीं आमच्याकडे आणिला
आहे. ११ मग त्यांनीं पलिष्टयांच्या सर्व सरदारांस
बोलावणें पाठवून जमविलें आणि म्हटलें, इस्राएलाच्या
देवाचा कोश येथून पाठवून द्या, तो स्वस्थानीं परत जाऊं
द्या, म्हणजे तो आमचा व आमच्या लोकांचा संहार
करावयाचा नाहीं; कारण सर्व नगरांत कहर गुदरला
होता, आणि देवाचा हात त्यांजवर जबर पडला
होता. १२ जे लोक मेले नाहींत त्यांच्या अंगावर
ग्रंथि उठल्या; त्या नगराचा आक्रोश गगनापर्यंत
जाऊन पोहंचला.

६ १ परमेश्वराचा कोश पलिष्टयांच्या मुलुखांत सात
महिने राहिला होता. २ नंतर पलिष्टयांनीं याजकांस
व शकुन पाहणाऱ्यांस बोलावून विचारिलें,
परमेश्वराच्या कोशाचें आम्हीं काय करावें? त्याच्या-
बरोबर काय देऊन तो स्वस्थानीं पाठवावा? ३ ते
म्हणाले, इस्राएलाच्या देवाचा कोश तुम्ही माघारा
पाठविणार तर तो नुसता पाठवूं नका; त्याबरोबर
त्याला दोषार्पणाचा बलि अवश्य पाठवा म्हणजे तुम्ही
बरे व्हाल व अद्यापि तुमच्यावरला त्याचा हात कां
निघत नाहीं हें तुम्हांस कळेल. ४ ते म्हणाले, त्याबरोबर
दोषार्पण पाठवावयाचें तें कोणतें? ते म्हणाले,
पलिष्टी सरदारांच्या संख्येइतक्या ग्रंथींच्या पांच व
उंदरांच्या पांच सोन्याच्या प्रतिमा; कारण तुम्हां सर्वांला
व तुमच्या सरदारांना सारखीच पीडा प्राप्त झाली आहे.
५ वास्तव ज्या ग्रंथींनीं आणि उंदरांनीं तुमच्या
देशाचा नाश होत आहे त्यांच्या प्रतिमा करा; आणि
इस्राएलाच्या देवाचा महिमा मान्य करा म्हणजे कदाचित्
तो तुमच्यावरला, तुमच्या देवांवरला व तुमच्या
देशावरला आपला हात काढील. ६ मिसरी लोक आणि
फारो यांनीं आपलीं मनें कठीण केलीं तशीं तुम्ही
आपलीं मनें कां कठीण करितां? देवानें मिसरी लोकां-
मध्यें अद्भुत कृत्यें केलीं तेव्हां इस्राएल लोकांस त्यांनीं
जाऊं दिलें, आणि ते निघून गेले, हें खरें ना? ७ तर
आतां तुम्ही एक नवी गाडी तयार करा; आणि ज्यांवर
अद्यापि जूं ठेविलें नाहीं अशा दोन दुभत्या गाई घेऊन
गाडीस जुंपा आणि त्यांचीं वासरें त्यांच्यापासून घरीं घेऊन
जा; ८ मग परमेश्वराचा कोश उचलून त्या गाडीवर
ठेवा आणि दोषार्पण म्हणून ज्या सोन्याच्या वस्तु तुम्ही
त्याजकडे पाठवाल त्या एका करंड्यांत घालून कोशाच्या
बाजूस ठेवा; मग ती गाडी चालू करून रस्त्यानें जाऊं
द्या; ९ मग, हें पाहा, जर तो आपल्या देशाच्या वाटेनें
बेथ-शेमेशाकडे गेला तर समजा कीं त्यानेंच आम्हांवर
ही पीडा पाठविली होती; तसें न झालें तर त्याच्या
हातानें आमच्यावर हा मार पडला नसून आम्हांला
ही पीडा दैवगतीनें प्राप्त झाली आहे असें आपण समजूं.
१० त्याप्रमाणें त्या लोकांनीं केलें; त्यांनीं दोन दुभत्या
गाई घेऊन गाडीस जुंपिल्या आणि त्यांचीं वासरें घरीं
कोंडून ठेविलीं. ११ त्या गाडीवर परमेश्वराचा कोश
आणि सोन्याचे उंदीर व ग्रंथींच्या प्रतिमा अस

असलेला करंडा ठेविला. १२ त्या माईनीं थेट बेथ-
शेमेशचा रस्ता धरिला; रस्त्यानें त्या हंबरत गेल्या,
उजवीडावीकडे वळल्या नाहींत; पलिष्ट्यांचे सरदार
त्यांच्यामागें बेथ-शेमेशच्या सीमेपर्यंत गेले. १३ या
प्रसंगीं बेथ-शेमेशचे लोक खोऱ्यांत गव्हांची कापणी
करीत होते; त्यांनीं वर नजर करून पाहिलें तो
त्यांच्या दृष्टीस कोश पडला; तो पाहून त्यांस आनंद
झाला. १४ ती गाडी यहोशवा बेथ-शेमेशकर याच्या
शेतांत जाऊन उभी राहिली; तेथें एक मोठी धोंड
होती. मग त्यांनीं गाडीचीं लाकडें फोडून त्या माईंचा
परमेश्वराप्रीत्यर्थ होमबलि अर्पिला. १५ परमेश्वराचा
कोश आणि त्याबरोबर सोन्याच्या वस्तु असलेला
करंडा होता तो लेव्यांनीं उतरून त्या धोंडीवर
ठेविला; मग त्या दिवशीं बेथ-शेमेशकरांनीं परमेश्वरा-
प्रीत्यर्थ होमार्पणें व यज्ञ केले. १६ हें पाहून
पलिष्ट्यांचे पांच सरदार त्याच दिवशीं एक्रोनास
परत गेले.

१७ पलिष्ट्यांनीं परमेश्वरास दोषार्पण म्हणून ज्या
ग्रंथींच्या सुवर्णप्रतिमा पाठविल्या त्या अश्दोदासाठीं
एक, गज्जासाठीं एक, अष्कलोनासाठीं एक, गथासाठीं
एक व एक्रोनासाठीं एक अशा होत्या; १८ ज्या मोठ्या
धोंडीवर परमेश्वराचा कोश उतरला होता तेथवर
पलिष्ट्यांच्या पांच सरदारांचीं जेवढीं तटबंदीचीं नगरें व
खेडींपाडीं होतीं, तेवढ्या नगरांच्या संख्येइतके सोन्याचे
उंदीर पाठविले होते; ती धोंड यहोशवा बेथ-शेमेशकर
याच्या शेतांत आजपर्यंत आहे. १९ बेथ-शेमेश येथल्या
लोकांनीं परमेश्वराच्या कोशाचें निरीक्षण केलें म्हणून
परमेश्वरानें त्यांचा संहार केला; त्यानें त्या लोकांतले
पन्नास हजार सत्तर पुरुष जिवें मारिलें; परमेश्वरानें
माणसांचा एवढा संहार केला म्हणून त्या लोकांनीं शोक
केला. २० बेथ-शेमेशकर म्हणूं लागले, या परमेश्वरा-
समोर, या पवित्र देवासमोर कोण टिकेल? तो आतां
आमच्याकडून निघून कोणाकडे जावा? २१ मग त्यांनीं
किर्याथ-यारीमच्या लोकांकडे जासूद पाठवून सांगितलें
कीं पलिष्ट्यांनीं परमेश्वराचा कोश माघारा आणिला आहे

तर तो तुम्ही आपल्याकडे घेऊन जा. १ यावरून
७ किर्याथ-यारीमकर आले व त्यांनीं परमेश्वराचा कोश
नेऊन टेकडीवर अबीनादाबाच्या घरीं ठेविला;
आणि परमेश्वराच्या कोशाचें रक्षण करण्यासाठीं त्यांनीं
त्याचा पुत्र एलाजार यास पवित्र केलें.

२ किर्याथ-यारीम येथें कोश नेऊन ठेविल्यास बहुत
काळ लोटला, म्हणजे वीस वर्षें निघून गेलीं; यानंतर
सर्व इस्राएल लोक परमेश्वराच्या दर्शनाविषयीं आतुर
झाले. ३ तेव्हां शमुवेलानें अवघ्या इस्राएल लोकांस
सांगितलें, तुम्ही मनःपूर्वक परमेश्वराकडे वळलां आहां
तर तुमच्यांतील अन्य देव व अष्टारोथ यांस दूर करा,
आणि परमेश्वराकडे आपलें चित्त लावून केवळ त्याचीच
उपासना करा, म्हणजे तो तुम्हांस पलिष्ट्यांच्या हातांतून
सोडवील. ४ मग इस्राएल लोक बाल देव व
अष्टारोथ यांस दूर करून केवळ परमेश्वराची उपासना
करूं लागले.

५ शमुवेल म्हणाला, सर्व इस्राएल लोकांस मिस्पांत
जमा करा म्हणजे मी तुम्हांसाठीं परमेश्वराची प्रार्थना
करीन. ६ तेव्हां ते मिस्पांत जमा झाले व त्यांनीं पाणी
काढून आणून परमेश्वरासमोर ओतिलें व त्या दिवशीं
उपास करून ते म्हणाले, आम्हीं परमेश्वराचा अपराध
केला आहे. त्या समयीं शमुवेल मिस्पांत इस्राएलाचा
न्यायइन्साफ करीत असे. ७ इस्राएल लोक मिस्पांत जमा
झाले आहेत हें पलिष्ट्यांनीं ऐकलें तेव्हां त्यांचे सरदार
इस्राएल लोकांवर चढाई करून आले. हें ऐकून इस्राएल
लोकांस पलिष्ट्यांची भीति पडली. ८ इस्राएल लोक
शमुवेलास म्हणाले, आमचा देव परमेश्वर यानें आम्हांस
पलिष्ट्यांच्या हातांतून सोडवावें म्हणून त्याची काकळूत कर-
ण्यास विसंबूं नका. ९ मग शमुवेलानें एक दूधपितें कोकरूं
घेऊन व त्याचा परमेश्वरास निःशेष होम करून इस्रा-
एलासाठीं परमेश्वराची आराधना केली व ती परमेश्वरानें
ऐकली. १० शमुवेल होमार्पण करीत असतांना पलिष्टी
इस्राएलाशीं लढावयास जवळ येऊन ठेपले; त्या दिवशीं
परमेश्वरानें प्रचंड गर्जना करून पलिष्ट्यांस घाबरें केलें,
आणि इस्राएलापुढें त्यांचा मोड झाला. ११ इस्राएल

लोकांनीं मिस्पांतून बाहेर पडून पलिष्ट्यांचा पाठलाग
केला, आणि ते बेथ-कारापाशीं पोंचत तोंपर्यंत त्यांस ते
मार देत गेले. १२ मग शमुवेलानें एक शिळा घेऊन
ती मिस्पा व शेन यांच्या दरम्यान उभी केली व तिला
एबन-एजर हें नांव देऊन म्हटलें कीं येथवर परमेश्वरानें
आमचें साहाय्य केलें आहे. १३ या प्रकारें पलिष्टी
पराजित झाल्यावर ते पुनः इस्राएलाच्या मुलुखांत आले
नाहींत; आणि शमुवेलाच्या सगळ्या हयातींत परमेश्वराचा
हात पलिष्ट्यांवर होता. १४ एक्रोनापासून गथपर्यंत जीं
नगरें पलिष्ट्यांनीं इस्राएलापासून घेतलीं होतीं तीं पुनः
त्यांच्या ताब्यांत आलीं, आणि त्यांच्या आसपासचा
प्रदेशहि इस्राएलानें पलिष्ट्यांच्या काबूतून सोडविला. त्या
समयीं इस्राएल व अमोरी लोक यांच्यांत स्वस्थता होती.
१५ शमुवेलानें आपल्या आयुष्यभर इस्राएलाचा न्याय-
इनसाफ केला. १६ तो वर्षानुवर्ष बेथेल, गिल्गाल व
मिस्पा या सर्व ठिकाणीं फेरी करून इस्राएलाचा न्याय-
इनसाफ करीत असे. १७ तो रामा येथें परत येत
असे; कारण तेथें त्याचें घर होतें. तेथें तो इस्राएलाचा
न्यायइनसाफ करी, तेथें त्यानें देवाप्रीत्यर्थ एक
वेदी बांधिली.

८ १ शमुवेलानें वृद्ध झाल्यावर आपल्या पुत्रांस
इस्राएलांचा न्यायइनसाफ करणारे नेमिलें. २ त्याच्या
ज्येष्ठ पुत्राचें नांव योएल असें होतें आणि दुसऱ्याचें
नांव अबीया असें होतें; बैर-शेबा येथें ते न्यायइनसाफ
करीत असत; ३ पण त्याचे पुत्र त्याच्या मार्गानें चालले
नाहींत; त्यांस पैशाचा लोभ लागून ते लांच खात व
न्याय विपरीत करीत.

४ नंतर इस्राएलाचे सर्व वडील जमा होऊन रामा
येथें शमुवेलाकडे आले. ५ ते त्यास म्हणाले, पाहां,
आतां तुम्ही वृद्ध झालां आहां आणि तुमच्या मार्गानें तुमचे
पुत्र चालत नाहींत; तर आतां इतर सर्व राष्ट्रांप्रमाणें
आमचा न्यायइनसाफ करावयास आम्हांवर एक राजा नेमा.
६ आमचा न्यायइनसाफ करावयास आम्हांस एक राजा द्या
असें ते म्हणाले त्यामुळें शमुवेलास वाईट वाटलें. मग
शमुवेलानें परमेश्वराची प्रार्थना केली. ७ तेव्हां परमेश्वर
शमुवेलास म्हणाला, लोक जें तुला सांगत आहेत तें
सगळें ऐक; कारण त्यांत ते तुझा धिक्कार करीत
नाहींत, तर मीं त्यांचा राजा नसावें म्हणून ते माझाच
धिक्कार करीत आहेत. ८ मीं त्यांस मिसर देशांतून
बाहेर आणिलें त्या दिवसापासून आजपर्यंत मजशीं
त्यांनीं असेंच वर्तन केलें आहे; त्यांनीं मला सोडून अन्य
देवांची उपासना केली; तसेंच ते तुजशीं वर्तन करीत
आहेत. ९ तर आतां त्यांचें म्हणणें ऐक; पण
त्यांची चांगली कानउघाडणी कर आणि त्यांच्यावर जो
राजा राज्य करील त्याची सत्ता कशी काय चालेल तें
त्यांस दाखवून दे.

१० मग ज्या लोकांनीं त्यांच्यापाशीं राजा मागितला
होता त्यांस शमुवेलानें परमेश्वराचें सर्व म्हणणें कळविलें.
११ तो म्हणाला, तुम्हांवर जो राजा राज्य करील तो
अशी सत्ता चालवील कीं तो तुमच्या पुत्रांस धरून
आपले रथ व घोडे यांची चाकरी करावयास ठेवील,
आणि ते त्याच्या रथांपुढें धावतील. १२ त्यांतून
कित्येक हजाराहजारांवर व पन्नासापन्नासांवर नायक
म्हणून तो नेमील; कित्येकांस आपलीं शेतें नांगरावयास,
कापावयास व आपल्या लढाईचीं व रथाचीं हत्यारें
करण्याच्या कामास लावील. १३ तो तुमच्या कन्यांस
धरून हलवाइणी, स्वयंपाकिणी व भटारणी करील.
१४ तो तुमचीं उत्तम उत्तम शेतें, द्राक्षांचे मळे व
जैतूनांचे मळे घेऊन आपल्या नोकरांस देईल. १५ तो
तुमचें धान्य व द्राक्षांचे मळे यांचा एक दशमांश घेऊन
आपले खोजे व चाकर यांस देईल. १६ तो तुमचे दास
व दासी, तुमचे देखणे तरुण पुरुष व गाढव धरून
आपल्या कामीं लावील. १७ तो तुमच्या शेरडामेंढरांचा
एक दशमांश घेईल; तुम्ही त्याचे दास व्हाल. १८ त्या
वेळीं तुम्ही निवडून घेतलेल्या राजाविषयीं गाऱ्हाणीं
कराल, पण परमेश्वर त्या समयीं तुमचें ऐकावयाचा
नाहीं. १९ तरी पण लोक शमुवेलाचें म्हणणें ऐकेनात;
ते म्हणाले, नाहीं, नाहीं, आमच्यावर राजा पाहिजेच;
२० म्हणजे इतर सर्व राष्ट्रांसमान आम्ही होऊं;

**१ पाठभेद :** खिल्लारें.

आमचा राजा आमचा न्यायइनसाफ करील व आमच्या-
पुढें चालून तो आमच्या लढाया लढेल. २१ शमु-
वेलानें लोकांचें हें सर्व म्हणणें ऐकून परमेश्वराच्या
कानावर घातलें. २२ परमेश्वर शमुवेलास म्हणाला,
त्यांचें म्हणणें ऐक आणि त्यांच्यावर एक राजा नेम.
मग शमुवेल इस्राएल लोकांस म्हणाला, तुम्ही आप-
आपल्या नगरांस जा.

९ १ एक बन्यामिनी मनुष्य होता, त्याचें नांव
कीश बिन अबीएल बिन सरोर बिन बखोरथ
बिन अफिया असें होतें; हा एका बन्यामिनी
मनुष्याचा पुत्र असून मोठा पराक्रमी पुरुष होता.
२ त्याचा शौल नामक एक मुलगा होता, तो तरुण व
देखणा होता; इस्राएल लोकांत त्याच्याइतका
देखणा कोणी नव्हता; तो एवढा उंच होता कीं सर्व
लोक त्याच्या केवळ खांद्याला लागत. ३ एकदां
शौलाचा बाप कीश याचीं गाढवें चुकलीं तेव्हां कीश
आपला पुत्र शौल यास म्हणाला, आपल्याबरोबर एक
गडी घेऊन जा आणि गाढवांचा शोध लाव. ४ त्यानें
एफ्राइमाचा डोंगरी प्रदेश व शलीशा प्रांत पायांखालीं
घातला तरी तीं त्याला सांपडलीं नाहींत; मग ते शालीम
प्रांतांत गेले तेथेंहि तीं नव्हतीं; नंतर ते बन्यामिन्यांच्या
प्रांतांत गेले तेथेंहि त्यांचा पत्ता लागला नाहीं. ५ ते
सूफ प्रांतांत आले तेव्हां शौल आपल्याबरोबरच्या
गड्यास म्हणाला, चल, आपण परत जाऊं, नाहीं तर
माझा बाप गाढवांची चिंता करण्याचें सोडून आपलीच
चिंता करीत बसेल. ६ तेव्हां तो त्यास म्हणाला, पाहा,
या नगरांत देवाचा एक माणूस राहत आहे, त्याची
लोकांत मोठी मानमान्यता आहे; तो जें कांहीं सांगतो
तें सर्व घडून येतें; चल, आपण तिकडे जाऊं; आपण
कोणत्या मार्गानें जावें हें तो आपणांस कदाचित्
सांगेल. ७ तेव्हां शौल आपल्या चाकरास म्हणाला, हें
पाहा, ,त्याजकडे जावयाचें तर त्याच्यासाठीं काय घेऊन
जावें ? आपल्या थैलींतल्या भाकरी सरल्या आहेत;
त्या देवाच्या माणसाला न्यावयास आपल्यापाशीं कांहीं
भेट नाहीं; आपल्यापाशीं काय आहे ? ८ त्या गड्यानें
शौलास उत्तर दिलें, पाहा, माझ्यापाशीं पाव शेकेल
रुपें आहे, तेवढें मीं त्या देवाच्या माणसास दिलें
म्हणजे आम्हीं कोणत्या मार्गानें जावें तें तो सांगेल.
९ पूर्वींच्या काळीं इस्राएलांत कोणी देवापाशीं प्रश्न
करण्यास जाई तेव्हां तो म्हणत असे कीं चला,
द्रष्ट्याकडे जाऊं; हल्लीं ज्याला संदेष्टा म्हणतात त्यास
पूर्वी द्रष्टा म्हणत. १० शौल आपल्या गड्यास म्हणाला,
ठीक आहे, चल आपण जाऊं. मग तो देवाचा माणूस
राहत होता त्या नगरास ते गेले. ११ ते चढण चढून
नगरांत जात असतां कांहीं तरुण मुली पाणी भरण्या-
साठीं जात होत्या त्या त्यांस भेटल्या; त्यांस त्यांनीं
विचारिलें, तो द्रष्टा येथें आहे काय ? १२ तेव्हां त्या
म्हणाल्या, होय, आहे; पहा तो पुढेंच आहे;
त्वरा करा, कारण तो आजच गांवीं आला आहे,
आज लोक उच्च स्थानीं होमहवन करणार आहेत;
१३ तर तुम्ही नगरांत जातांच तो त्या उच्चस्थानीं
भोजनास जाण्याच्या अगोदर तुम्हांस भेटेल; तो
यज्ञाला आशीर्वाद देतो म्हणून तो तेथें येण्यापूर्वी
लोक जेवीत नसतात; नंतर आमंत्रित लोक भोजन
करितात. तर आतां तुम्ही वर चढून जा. आतांच
त्याची भेट होईल. १४ ते वर नगराकडे गेले;
आणि ते नगरांत जाऊन पोहंचतात तों शमुवेल
उच्चस्थानीं जाण्यास निघाला होता तो त्यांस समोरून
येतांना भेटला.

१५ शौल येण्यापूर्वी एक दिवस आधीं परमेश्वरानें
शमुवेलास आदेश दिला होता कीं १६ उद्यां या
सुमारास मी तुझ्याकडे बन्यामिनी देशचा एक मनुष्य
पाठवीन, त्यास अभिषेक करून माझ्या इस्राएल लोकां-
वर अधिपति नेम; तो माझ्या लोकांस पलिष्ट्यांच्या
हातांतून सोडवील; कारण माझ्या लोकांचें गाऱ्हाणें
मजकडे आलें आहे म्हणून त्यांजकडे माझी नजर
गेली आहे. १७ शौल शमुवेलाच्या दृष्टीस पडला
तेव्हां परमेश्वर त्यास म्हणाला, ज्या पुरुषाविषयीं
मीं तुला सांगितलें होतें तो हा; हाच माझ्या
लोकांवर सत्ता चालवील. १८ मग शौल वेशीजवळ

शमुवेलाकडे जाऊन म्हणाला, द्रष्ट्याचें घर कोठें
आहे तें मला सांगा. १९ शमुवेल शौलास म्हणाला,
द्रष्टा मीच आहें, मजपुढें उच्चस्थानीं चला; आज
तुम्हीं मजबरोबर भोजन करावें; सकाळीं तुम्ही
रवानगी करतेवेळीं तुझ्या मनांत जें कांहीं आहे
त्याविषयीं मी तुला सांगेन. २० तीन दिवसांमागें
चुकलेल्या तुझ्या गाढवांसंबंधानें कांहीं चिंता करूं
नको, कारण तीं सांपडलीं आहेत. इस्राएलांतली सर्व
संपत्ति कोणासाठीं आहे? तुझ्यासाठीं व तुझ्या
बापाच्या घराण्यासाठीं आहे कीं नाहीं? २१ शौल
म्हणाला, इस्राएल वंशांतले सर्वांहून कनिष्ठ जे बन्यामिनी
त्यांतला मी ना? आणि बन्यामिनाच्या वंशांतील
सगळ्या कुळांत माझें घराणें कनिष्ठ ना? तर मग तुम्ही
मजशीं असलें भाषण कां करितां? २२ शमुवेलानें
शौलास व त्याच्या गड्यास भोजनगृहांत नेलें; आणि
तेथें सुमारें तीस जण आमंत्रित होते त्यांच्या पंक्तीतल्या
प्रमुखस्थानीं त्यांस बसविलें. २३ शमुवेलानें आचाऱ्यास
सांगितलें, जो वांटा मीं तुला राखून ठेवावयास
सांगितलें होतें तो घेऊन ये. २४ आचाऱ्यानें
मांसाचा फरा व त्याबरोबर जें कांहीं होतें तें वर
उचलिलें आणि मग शौलापुढें ठेविलें. तेव्हां शमुवेल
म्हणाला, हें पाहा, हें राखून ठेविलेलें आहे, हें आपल्या-
समोर ठेवून खा; कारण मीं लोकांस आमंत्रण केलें
तेव्हांपासून ह्या नेमिलेल्या समयापर्यंत तुजसाठीं हें
राखून ठेविलें आहे. या प्रकारें शौलानें त्या दिवशीं
शमुवेलाबरोबर भोजन केलें. २५ मग त्या उच्चस्थाना-
वरून उतरून ते नगरांत आले तेव्हां त्यानें धाब्यावर
जाऊन शौलाशीं एकांतांत बोलणें केलें. २६ सकाळीं
ते पहाटेस उठले व सूर्योदयाच्या सुमारास शौल
धाब्यावर होता त्यास शमुवेलानें हाक मारून म्हटलें,
ऊठ, मी तुझी रवानगी करितों. शौल उठला आणि तो
व शमुवेल असे दोघे बाहेर पडले. २७ गांव संपतो
तेथें खालीं उतरत असतां शमुवेल शौलास म्हणाला,
आपल्या गड्याला पुढें जाऊं दे (त्याप्रमाणें तो पुढें
गेला), तूं अमळ थांब; मी तुला परमेश्वराचा संदेश
ऐकवितों. १ मग शमुवेलानें तेलाची कुपी
१० घेऊन शौलाच्या मस्तकावर ओतिली व त्याचें
चुंबन घेऊन म्हटलें, परमेश्वरानें तुला ह्या
अभिषेक केला आहे तो त्याच्या वतनाचा अधिपति
व्हावें म्हणूनच ना? २ आज तूं मजकडून गेलास
म्हणजे बन्यामिनी प्रदेशाच्या सीमेवर सेल्सह येथें
राहेलीच्या थडग्याजवळ तुला दोन पुरुष भेटतील; ते
तुला म्हणतील, तूं जीं गाढवें शोधावयास गेला होतास
तीं सांपडलीं आहेत; आणि पाहा, तुझ्या बापानें
गाढवांची चिंता करावयाचें सोडिलें आहे; आतां त्याला
तुमचाच घोर लागला आहे; तो म्हणतो, मी आपल्या
पुत्रासाठीं आतां काय करूं? ३ मग तेथून पुढें जातांना
ताबोरचा एला वृक्ष तुला लागेल, तेथें तीन मनुष्यें
बेथेल येथें देवाकडे जातांना तुला आढळतील,
त्यांतल्या एकाच्या हातीं तीन करडें, दुसऱ्याच्या
हातीं तीन भाकरी आणि तिसऱ्याच्या हातीं एक
द्राक्षारसाचा बुधला अशीं असतील; ४ ते तुला
सलाम करतील व तुला दोन भाकरी देतील, त्या तूं
त्यांच्या हातांतून घे. ५ मग देवाच्या टेकडीपाशीं
पोहंचशील, तेथें पलिष्ट्यांचा चौकीपहारा आहे; तूं
तेथें नगराजवळ पोहंचल्यावर संदेष्ट्यांचा एक समुदाय
उच्चस्थानाहून उतरून येतांना तुला भेटेल, त्यांच्यापुढें
सतार, डफ, सनई व वीणा वाजत असतील; व ते
भाषण करीत असतील; ६ तेव्हां परमेश्वराचा आत्मा
तुजवर जोरानें येईल व तूंहि त्यांच्याबरोबर भाषण करूं
लागशील व तुझ्यांत बदल होऊन तूं निराळा मनुष्य
होशील. ७ हीं चिन्हें तुला प्राप्त झालीं म्हणजे तुला जें
कर्तव्य करणें प्राप्त होईल तें तूं करावें; कारण देव तुझ्या-
बरोबर आहे. ८ तूं माझ्या अगोदर गिल्गाल येथें
जा; मग मी होमबलि अर्पिण्यास व शांत्यर्पणांचे यज्ञ
करण्यास तुजकडे येईन; तूं सात दिवस माझी वाट
पाहत राहा; मग मी तुझ्याकडे येऊन तुला काय काय
करावयाचें हें दाखवीन. ९ शमुवेलापासून निघून जाण्या-
साठीं त्याची पाठ वळली तोंच देवानें त्याचें मन बदलून
टाकिलें व हीं सर्व चिन्हें त्यास त्या दिवशीं प्राप्त झालीं.

१० ते टेकडीपाशीं आले तेव्हां, पाहा, संदेष्ट्यांचा एक समुदाय त्याला भेटला; आणि देवाचा आत्मा त्याजवर जोरानें आला व तो त्यांच्याबरोबर भाषण करूं लागला. ११ जे लोक त्याला पूर्वीपासून ओळखीत होते त्यांनीं जेव्हां पाहिलें कीं हा संदेष्ट्यांबरोबर भाषण करीत आहे तेव्हां ते आपसांत म्हणूं लागले, किशाच्या पुत्राला काय झालें? शौल हाहि संदेष्ट्यांपैकीं आहे काय? १२ तेव्हां तेथल्या एका मनुष्यानें उत्तर दिलें; तो म्हणाला, या संदेष्ट्यांचा बाप कोण होता? यावरून शौलहि संदेष्ट्यांपैकीं आहे काय अशी म्हण पडली. १३ मग भाषण करणें संपल्यावर तो उच्चस्थानीं गेला.

१४ शौलाचा काका त्याला व त्याच्या गड्यास म्हणाला, तुम्ही कोठें गेलां होतां? ते म्हणाले, गाढवें शोधावयाला; तीं सांपडत नाहींत असें पाहून आम्ही शमुवेलाकडे गेलों. १५ शौलाचा काका म्हणाला, शमुवेल तुम्हांस काय म्हणाला तें मला सांगावें. १६ शौल आपल्या काकास म्हणाला, गाढवें सांपडलीं आहेत असें त्यानें आम्हांस कळविलें. शमुवेलानें राजपदाविषयीं जें कांहीं सांगितलें होतें त्यासंबंधानें त्यानें त्याला कांहींएक कळविलें नाहीं.

१७ मग शमुवेलानें लोकांस मिस्पांत परमेश्वरापुढें बोलावून जमा केलें. १८ तो इस्राएल लोकांस म्हणाला, इस्राएलाचा देव परमेश्वर असें म्हणतो, मीं इस्राएलास मिसर देशांतून बाहेर आणिलें आणि तुम्हांस मिसरी लोकांच्या हातांतून आणि तुम्हांस गांजणाऱ्या सर्व राष्ट्रांच्या हातांतून सोडविलें; १९ पण तुम्हांस सर्व विपत्तींतून व संकटांतून सोडविणाऱ्या तुमच्या देवाचा आज तुम्हीं अव्हेर केला आहे, व तुम्ही त्यास म्हणालां आहां कीं हें ठीक नव्हे, आम्हांवर राजा नेमावा. तर आतां वंशावंशांनीं आणि हजाराहजारांनीं परमेश्वरासमोर येऊन हजर व्हा. २० शमुवेलानें इस्राएलाचे सगळे वंश जवळ आणिले, आणि बन्यामिनाच्या वंशाची चिठी निघाली. २१ मग बन्यामिनी वंश कुळाकुळांनीं जवळ आणिला तेव्हां मात्रीच्या कुळाची चिठी निघाली; व शेवटीं किशाचा पुत्र शौल याच्या नांवाची चिठी निघाली; त्यांनीं त्याला शोधिलें पण तो कोठें सांपडेना. २२ तेव्हां त्यांनीं परमेश्वराला आणखी विचारिलें, तो मनुष्य येथें आला आहे काय? परमेश्वरानें सांगितलें, पाहा, तो सामानासुमानांत लपून राहिला आहे. २३ त्यांनीं धावत जाऊन त्याला तेथून आणिलें, आणि तो लोकांमध्यें उभा राहिला तेव्हां तो उंच दिसला; सर्व लोक त्याच्या केवळ खांद्याला लागले. २४ मग शमुवेल लोकांस म्हणाला, परमेश्वरानें ज्यास निवडिलें त्यास तुम्ही पाहत आहां ना? सर्व लोकांमध्यें त्याच्या बरोबरीचा कोणी नाहीं. तेव्हां सर्व लोकांनीं म्हटलें, राजा चिरायु होवो.

२५ नंतर शमुवेलानें लोकांस राजनीति सांगितली, व ती एका ग्रंथांत लिहून तो ग्रंथ परमेश्वरापुढें ठेवून दिला. मग शमुवेलानें सर्व लोकांस आपआपल्या घरीं जाण्यास निरोप दिला. २६ शौलहि गिबा येथें आपल्या घरीं गेला व ज्या सैनिकांच्या मनास देवाकडून स्फूर्ति झाली ते त्याच्याबरोबर गेले; २७ पण कांहीं अधम लोक बोलले, हा मनुष्य आमचा काय उद्धार करणार? त्यांनीं त्यास तुच्छ मानिलें आणि त्याला कांहीं नजराणा आणिला नाहीं; पण त्यानें तें ऐकलें न ऐकलेंसें केलें.

११ १ नंतर अम्मोनी नाहाश यानें स्वारी करून याबेश-गिलादासमोर तळ दिला; तेव्हां याबेशाचे सर्व लोक नाहाश यास म्हणाले कीं आमच्याशीं करारमदार कर म्हणजे आम्ही तुझे अंकित होऊं. २ नाहाश अम्मोनी त्यांस म्हणाला, मी तुम्हां सर्वांचा उजवा डोळा फोडून अवघ्या इस्राएलांची अप्रतिष्ठा करीन, या अटीवर मी तुम्हांशीं करार करीन. ३ याबेशाच्या वडील लोकांनीं त्यास म्हटलें, आम्हांस सात दिवसांचा अवकाश द्या म्हणजे तेवढ्यांत इस्राएल लोकांच्या सर्व प्रांतांत आम्ही जासूद पाठवूं; आणि जर आमचा बचाव करण्यासाठीं कोणी आला नाहीं तर मग आम्ही बाहेर निघून तुम्हांकडे येऊं. ४ मग जासुदांनीं शौलाच्या गिब्यास जाऊन हें वर्त-

मान लोकांच्या कानावर घातलें; तें ऐकून सर्व लोक
हेल काढून रडूं लागले. ५ तेव्हां शौल गुरांच्या मागून
शेतांतून येत होता; त्यानें विचारिलें, लोक कां रडतात ?
त्यांस काय झालें ? याबेशच्या लोकांचें म्हणणें त्यांनीं
त्याला कळविलें. ६ शौलानें हें वर्तमान ऐकतांच
देवाचा आत्मा त्याच्यावर जोरानें येऊन तो मनस्वी संतप्त
झाला. ७ त्यानें एक बैलाची जोडी कापून त्यांचे तुकडे
केले व ते जासुदांच्या हातीं इस्राएलाच्या सर्व प्रांतांत
पाठविले आणि त्यांस निरोप दिला कीं जो कोणी शौल
व शमुवेल यांच्यामागें येणार नाहीं त्यांच्या बैलांची
अशीच गत होईल. तेव्हां परमेश्वराची दहशत लोकां-
वर बसून ते एकचित्तानें बाहेर निघाले. ८ त्यानें
बेजेक येथें त्यांची टीप घेतली तेव्हां इस्राएलाचे तीन
लक्ष पुरुष व यहूदाचे तीस हजार पुरुष भरले.
९ त्यांनीं त्या आलेल्या जासुदांस सांगितलें, तुम्ही
याबेश-गिलादाच्या लोकांस जाऊन सांगा कीं उद्यां
ऊन होण्याच्या सुमारास तुम्हांस कुमक येऊन पोहंचेल.
त्या जासुदांनीं जाऊन याबेशच्या लोकांस हें सांगितलें
तेव्हां त्यांस फार आनंद झाला. १० मग याबेशच्या
लोकांनीं सांगून पाठविलें कीं आम्ही उद्यां बाहेर
निघून तुमच्याकडे येऊं, मग तुमच्या मनास येईल
तसें आमचें करा. ११ दुसऱ्या दिवशीं शौलानें
आपल्या लोकांच्या तीन तुकड्या केल्या आणि रात्रीच्या
शेवटल्या प्रहरीं त्यांनीं छावणींत येऊन ऊन होईपर्यंत
अम्मोन्यांला हाणमार केली; आणि जे बाकी राहिले
त्यांची एवढी दाणादाण केली कीं त्यांच्यांतले दोनसुद्धां
एकत्र राहिले नाहींत. १२ मग लोकांनीं शमुवेलास
विचारिलें, हा शौल आमच्यावर राज्य करणार काय
असें जे म्हणाले ते कोणते लोक ? त्यांस बाहेर काढा
म्हणजे आम्ही त्यांस मारून टाकूं. १३ शौल म्हणाला,
आज कोणाहि मनुष्याचा वध करावयाचा नाहीं;
कारण आज परमेश्वरानें इस्राएलाचा उद्धार केला आहे.

१४ मग शमुवेल लोकांस म्हणाला, चला, आपण
गिल्गालास जाऊं व तेथें राज्याची पुनः स्थापना करूं.
१५ तेव्हां सर्व लोक गिल्गालास गेले व तेथें त्यांनीं
परमेश्वरासमोर शौलास राजा केलें; तेथें त्यांनीं
परमेश्वरास शांत्यर्पणाचे यज्ञ केले; आणि शौल व
इस्राएल लोक यांनीं तेथें मोठा उत्सव केला.

१२ १ शमुवेल सर्व इस्राएल लोकांस म्हणाला,
पाहा, तुम्हीं मला जें कांहीं सांगितलें तें सगळें
मीं ऐकून तुम्हांवर राजा नेमिला आहे. २ तर
आतां पाहा, तो राजा तुम्हांसमोर वर्तत आहे; मी
तर वृद्ध झालों असून माझे केस पिकले आहेत; आणि
पाहा, माझे पुत्र तुम्हांमध्यें आहेत. मी बाळपणापासून
आजवर तुम्हांसमोर वागलोंवर्तलों आहें. ३ हा मी
तुमच्यापुढें आहें, परमेश्वरासमक्ष व त्याच्या अभिषिक्ता-
समक्ष माझ्याविरुद्ध कांहीं असेल तर सांगा; मीं
कोणाचा बैल घेतला आहे काय ? कोणाचें गाढव
घेतलें आहे काय ? कोणाला फसविलें आहे काय ?
कोणावर बलात्कार केला आहे काय ? डोळेझांक
करण्यासाठीं कोणाच्या हातून लांच घेतली आहे
काय ? असें कांहीं असल्यास सांगा म्हणजे मी
त्याची भरपाई करीन. ४ ते म्हणाले, तुम्हीं आम्हांस
फसविलें नाहीं; आम्हांवर जुलूम केला नाहीं अथवा
कोणाच्या हातून कांहीं घेतलें नाहीं. ५ तो त्यांस म्हणाला,
माझ्या हातीं तुम्हांस कांहीं सांपडलें नाहीं याबद्दल
आज परमेश्वर तुमच्यासंबंधानें साक्षी आहे, व
त्याचा अभिषिक्तहि आज साक्षी आहे. ते म्हणाले,
होय; तो साक्षी आहे. ६ शमुवेल लोकांस म्हणाला,
ज्यानें मोशे व अहरोन यांस नेमिलें व तुमच्या वाड-
वडिलांस मिसर देशांतून आणिलें तो परमेश्वरच होय.
७ तर आतां तुम्ही स्तब्ध उभे राहा म्हणजे तुम्ही व
तुमचे वडील यांच्या बाबतींत परमेश्वरानें जीं न्याय-
कृत्यें केलीं त्यांच्यासंबंधाचा वाद मी तुमच्याशीं परमे-
श्वरासमोर चालवितों. ८ याकोब मिसरांत गेला आणि
तुमच्या वाडवडिलांनीं परमेश्वराचा धावा केला तेव्हां
परमेश्वरानें मोशे व अहरोन यांस पाठविलें व त्यानें
तुमच्या वाडवडिलांस मिसरांतून काढून आणून या स्थळीं
वसविलें; ९ पण त्यांचा देव परमेश्वर याचें त्यांस
विस्मरण झालें तेव्हां त्यानें हासोराच्या सेनापति

सीसरा, पलिष्टी लोक आणि मवाबचा राजा यांच्या
स्वाधीन त्यांस केलें, मग ते त्यांशीं लढले. १० त्यांनीं
परमेश्वराचा धावा करून म्हटलें, आम्हीं पातक केलें
आहे, कारण आम्हीं परमेश्वराला सोडून बाल देव व
अष्टारोथ यांची भक्ति केली; तर आतां आमच्या
शत्रूंच्या हातांतून आम्हांस सोडीव म्हणजे आम्ही
तुझी भक्ति करूं. ११ यावर परमेश्वरानें यरुब्बाल,
बदान, इफताह व शमुवेल यांस पाठवून तुम्हांस
तुमच्या चहूंकडल्या शत्रूंच्या हातांतून सोडविलें व
तुम्ही निर्भय राहूं लागलां. १२ तरी पण अम्मोन्यांचा
राजा नाहाश आपल्यावर स्वारी करीत आहे असें तुम्हीं
पाहिलें तेव्हां परमेश्वर तुमचा देव तुमचा राजा
असूनहि तुम्ही मला म्हणालां, हें ठीक नाहीं, आम्हांवर
राज्य करण्यास राजा असावा. १३ तर आतां जो राजा
तुम्हीं निवडून घेतला व मागून घेतला तो हा पाहा;
परमेश्वरानें तुम्हांवर हा राजा नेमिला आहे. १४ तुम्ही
परमेश्वराचें भय धरून त्याची भक्ति करीत राहाल,
त्याची वाणी ऐकत राहाल, त्याच्या धर्मशास्त्राविरुद्ध
बंडावा करणार नाहीं आणि तुमच्यावर राज्य करणारा
हा राजा व तुम्ही आपला देव परमेश्वर याचें अनुसरण
कराल तर बरें; १५ परंतु तुम्ही परमेश्वराची वाणी
ऐकणार नाहीं आणि परमेश्वराच्या धर्मशास्त्राविरुद्ध
बंडावा कराल तर परमेश्वराचा हात जसा तुमच्या
वाडवडिलांविरुद्ध झाला होता तसा तुमच्याहि विरुद्ध
होईल. १६ आतां स्थिर उभे राहा आणि परमेश्वर
तुम्हांसमक्ष मोठी कृति करणार आहे ती पाहा.
१७ आज गव्हाची कापणी चालू आहे ना? परमेश्वरानें
मेघगर्जना करून पर्जन्यवृष्टि करावी अशी मी प्रार्थना
करीन, म्हणजे मग तुम्हीं आपणांसाठीं राजा मागून परमे-
श्वराच्या दृष्टीनें केवढा अपराध केला आहे हें तुमच्या
लक्षांत येईल. १८ मग शमुवेलानें परमेश्वराची प्रार्थना
केली, आणि परमेश्वरानें त्याच दिवशीं गर्जना व
पर्जन्यवृष्टि केली तेव्हां सर्व लोकांस परमेश्वराची व
शमुवेलाची दहशत बसली. १९ तेव्हां सर्व लोक
शमुवेलास म्हणाले, आपल्या दासांप्रीत्यर्थ आपला देव
परमेश्वर याची प्रार्थना करा म्हणजे आम्ही मरावयाचे
नाहीं; आम्हीं राजा मागितला त्यामुळें आमच्या
एकंदर पातकांस हें एक दुष्कर्म आम्हीं जोडिलें आहे.
२० शमुवेल लोकांस म्हणाला, भिऊं नका, हें दुष्कर्म
तुम्हीं केलें आहे खरें, पण आतां परमेश्वराला
अनुसरण्याचें सोडून दुसरीकडे वळूं नका, तर
मनोभावें परमेश्वराची सेवा करा; २१ ज्या निरर्थक
वस्तूंपासून तुम्हांस कांहीं लाभ व्हावयाचा नाहीं व तुमचा
उद्धार व्हावयाचा नाहीं त्यांच्यामागें लागूं नका;
कारण त्या केवळ निरर्थक होत. २२ परमेश्वर आपल्या
थोर नामास्तव आपल्या लोकांचा त्याग करणार नाहीं;
कारण परमेश्वरानें कृपावंत होऊन तुम्हांस आपले
प्रजाजन केलें आहे. २३ तुम्हांसाठीं प्रार्थना करा-
वयाची सोडून देणें हा परमेश्वराचा अपराध माझ्या
हातून न घडो; मी तुम्हांस चांगला व सरळ मार्ग
दाखवितों; २४ मात्र तुम्ही परमेश्वराचें भय धरा व
सत्यानें व जिवेंभावें त्याची सेवा करा; त्यानें तुम्हांसाठीं
केवढीं महत्कृत्यें केलीं आहेत याचा विचार करा;
२५ पण तुम्ही दुष्कृत्यें करीत राहाल तर तुम्ही नष्ट
व्हाल व तुमचा राजा नष्ट होईल.

१३ [१] शौल [ तीस ] वर्षांचा असतां राज्य
करूं लागला. त्यानें दोन वर्षें इस्राएलावर
राज्य केल्यावर २ इस्राएलांतले तीन हजार
पुरुष निवडिले; त्यांपैकीं दोन हजार शौलाबरोबर
मिखमाश येथें व बेथेलच्या डोंगरावर राहिले आणि
एक हजार योनाथानाबरोबर बन्यामिनाच्या गिब्यांत
राहिले; बरकड सर्व लोकांस त्यानें आपआपल्या
डेऱ्यांकडे रवाना केलें. ३ गिबा येथें पलिष्ट्यांचें
ठाणें होतें त्यावर योनाथानानें मारा केला; हें
वर्तमान पलिष्ट्यांच्या कानीं गेलें. मग शौलानें
देशभर रणशिंग वाजवून लोकांस सांगितलें कीं इब्री
लोकहो, कान द्या. ४ शौलानें पलिष्ट्यांच्या ठाण्यावर
मारा केला आणि पलिष्टी लोकांना इस्राएलाचा वीट
आला, हें सर्व इस्राएलाच्या कानीं गेलें. हें ऐकून

१ मुळांत: एक

लोक शौलाजवळ गिल्गालांत जमा झाले.
५ तेव्हां पलिष्टी लोक इस्राएल लोकांशीं लढण्यास
जमा झाले; तीस हजार रथ, सहा हजार स्वार आणि
समुद्रकिनाऱ्यावरील वाळूइतके विपुल लोक एकवट
झाले; त्यांनीं बेथ-आवेनाच्या पूर्वेस जाऊन मिखमाश
येथें तळ दिला. ६ आपण पेंचांत सांपडलों आहों असें
इस्राएल लोकांनीं पाहिलें, ( खरोखरच त्या लोकांस संकट
प्राप्त झालें होतें, ) तेव्हां ते गुहा, झुडपें, खडक, दुर्ग
व विवरें यांत लपले. ७ कित्येक इब्री लोक यार्देन
ओलांडून गाद व गिलाद या प्रांतांत गेले, पण शौल
गिल्गालांतच राहिला, व सर्व लोक थरथरां कांपत
त्याच्या मागून गेले.

८ शमुवेलानें मुदत ठरविली होती तीप्रमाणें सात
दिवस तो वाट पाहत राहिला; पण शमुवेल गिल्गालास
आला नाहीं म्हणून लोक त्याजकडून निघून पांगूं लागले.
९ तेव्हां होमबलि व शांत्यर्पणें मजकडे आणा असें
सांगून शौलानें स्वतःच होम केला. १० त्यानें होमाची
समाप्ति केली तोंच शमुवेल आला; तेव्हां शौल त्याला
भेटून नमस्कार करावयास बाहेर गेला. ११ शमुवेलानें
त्याला विचारिलें, तूं हें काय केलें ? शौलानें म्हटलें,
जेव्हां मीं पाहिलें कीं लोक मजकडून पांगत आहेत,
ठरलेल्या मुदतीच्या आंत आपण आलां नाहीं आणि
पलिष्टी लोक मिखमाश येथें एकत्र जमून आले,
१२ तेव्हां मी म्हणालों, आतां पलिष्टी लोक
गिल्गालांत येऊन मजवर हल्ला करितील, आणि मीं
तर परमेश्वराचा प्रसाद अजून मागितला नाहीं; म्हणून
माझ्या मनाविरुद्ध वागणें भाग पडून मीं होम केला.
१३ शमुवेल शौलास म्हणाला, तूं मूर्खपणा केला; तुझा
देव परमेश्वर यानें तुला केलेली आज्ञा तूं मानिली
नाहीं; मानिली असती तर परमेश्वरानें इस्राएलावर
तुझें राज्य निरंतरचें स्थापिलें असतें; १४ पण आतां
तुझें राज्य कायम राहावयाचें नाहीं. परमेश्वरानें
आपल्यासाठीं आपल्या मनासारखा मनुष्य धुंडून त्यास
आपल्या लोकांचा अधिपति नेमिलें आहे; कारण
परमेश्वरानें तुला केलेली आज्ञा तूं पाळिली नाहीं.

१५ मग शमुवेल तेथून निघून गिल्गालाहून
बन्यामिनाचें गिबा येथें गेला. शौलानें आपल्या-
बरोबरचीं माणसें मोजिलीं तीं सहाशें भरलीं. १६ शौल,
त्याचा पुत्र योनाथान व त्यांच्याबरोबर असलेले लोक
बन्यामिनाचें गिबा येथें राहिले; पलिष्टी मिखमाश
येथें तळ देऊन राहिले. १७ मग पलिष्ट्यांच्या छावणी-
तून लुटालूट करणारे लोक तीन टोळ्या करून निघाले;
एक टोळी शुवाल नामक प्रांताकडे अफ्राच्या वाटेनें
गेली; १८ दुसरी टोळी बेथ-होरोनाच्या वाटेनें गेली
आणि तिसरी टोळी सबोईम खोऱ्याकडील प्रांताच्या
वाटेनें रानाकडे गेली.

१९ इस्राएलाच्या अवघ्या देशांत कोणी लोहार
मिळत नसे; कारण इब्री लोकांस तरवारी अथवा
भाले करितां येऊं नयेत असा पलिष्ट्यांचा उद्देश होता;
२० फाळ, कुदळ, कुऱ्हाड व दांताळें यांस धार
लावावयाची असली तर सर्व इस्राएल लोक पलिष्ट्यांकडे
जात; २१ त्यांचीं दांताळीं, कुदळी, फाळ, कुऱ्हाडी व
पराण्या हीं बोथट राहत. २२ ह्यामुळें युद्धाच्या समयीं
असें झालें कीं शौल व योनाथान यांच्याबरोबर असलेल्या
कोणाहि मनुष्याच्या हातीं तरवार किंवा भाला नव्हता;
शौल व त्याचा पुत्र योनाथान यांच्यापाशीं मात्र
हीं हत्यारें होतीं. २३ नंतर पलिष्टी आपलें ठाणें
उठवून मिखमाशाच्या घाटांत गेले.

१४ १ एके दिवशीं शौलाचा पुत्र योनाथान
आपल्या शस्त्रवाहक तरुण सेवकाला म्हणाला,
चल, आपण पलीकडे पलिष्ट्यांचें ठाणें आहे,
तेथें जाऊं; पण त्यानें हें बापास कळविलें नाहीं.
२ शौल गिब्याच्या सीमेवर मिग्रोन येथील डाळिंबीच्या
झाडाखालीं राहिला होता व त्याजबरोबर सुमारें सहाशें
लोक होते; ३ अहीया बिन अहीटूब (ईखाबोदाचा
भाऊ) बिन फिनहास बिन एली हा शिलोंत परमे-
श्वराचा याजक होता; तो एफोद धारण करून त्याज-
बरोबर होता. योनाथान गेला हें लोकांस माहीत नव्हतें.
४ ज्या घाटांनीं योनाथान पलिष्ट्यांच्या छावणीकडे
जाऊं पाहत होता त्यांच्या एका बाजूला एक व दुसऱ्या

बाजूला एक असे दोन सुळके होते; एका सुळक्याचें
नांव बोसेस व दुसऱ्याचें नांव सेने असें होतें. ५ एक
सुळका उत्तरेकडे मिखमाशासमोर व दुसरा दक्षिणेस
गिब्यासमोर आहे. ६ तेव्हां योनाथानानें आपल्या
शस्त्रवाहक तरुण सेवकास म्हटलें, चल, आपण त्या
बेसुनत लोकांच्या ठाण्याकडे जाऊं कदाचित् परमेश्वर
आपलें कार्य करील; परमेश्वराला बहुत लोकांच्या
द्वारें किंवा थोडक्यांच्या द्वारें सुटका करण्यास हरकत
नाहीं. ७ त्याच्या शस्त्रवाहकानें, त्यास म्हटलें,
आपल्या मनास येईल तें सगळें करा, तेथें चला; आपल्या
मर्जीस येईल त्यांत मी आपल्याबरोबर आहें. ८ योना-
थान म्हणाला, पाहा, आपण त्या मनुष्यांजवळ जाऊन
त्यांच्या दृष्टीस पडूं. ९ ते जर आपल्याला म्हणाले कीं
थांबा, आम्ही तुमच्याकडे येतों, तर आपण जागच्या
जागीं थांबूं, त्यांच्याकडे वर जाणार नाहीं; १० पण
जर ते म्हणाले, आमच्याकडे वर या, तर आपण वर
जाऊं; परमेश्वरानें त्यांस आमच्या हातीं दिलें आहे
याची हीच खूण आपण समजूं. ११ मग ते दोघे
पलिष्ट्यांच्या ठाण्यांतील माणसांच्या दृष्टीसमोर गेले;
तेव्हां पलिष्टी म्हणाले, पाहा, इब्री लोक बिळांत लपून
राहिले होते ते आतां बाहेर पडत आहेत. १२ त्या
ठाण्यांतले लोक योनाथानास व त्याच्या शस्त्रवाहकास
म्हणाले, तुम्ही आम्हांकडे या, म्हणजे आम्ही तुम्हांस
कांहीं दाखवूं. योनाथान आपल्या शस्त्रवाहकास म्हणाला,
माझ्यामागून वर ये; कारण परमेश्वरानें त्यांस इस्रा-
एलाच्या हातीं दिलें आहे. १३ योनाथान व त्याच्या-
मागून त्याचा शस्त्रवाहक हे मेटाकुटीनें वर चढले.
योनाथानापुढें पलिष्टी लोक चीत झाले व त्याच्या
शस्त्रवाहकानें त्याच्यामागून जाऊन त्यांचा संहार
केला. १४ योनाथान व त्याचा शस्त्रवाहक यांनीं जी
पहिली कत्तल केली तींत एक बिघाभर जमिनीवर
सुमारें वीस माणसें पडलीं. १५ मग छावणींतील व
मैदानांतील इतर सर्व लोकांचा थरकांप झाला;
ठाण्यांतील लष्कर व लूट करणारे लोक हेहि थरथरां
कांपूं लागले; भूमिहि कंपायमान झाली; या प्रकारें
प्रचंड कंप झाला. १६ इकडे बन्यामिनाच्या गिब्यांतल्या
शौलाच्या पहारेकऱ्यांनीं पाहिलें तों समुदाय विसकळून
जात होता, लोक जिकडेतिकडे पांगत होते.

१७ तेव्हां शौलानें आपल्याबरोबरच्या लोकांस
म्हटलें, आपल्या लोकांची मोजणी करून त्यांच्या-
मधून कोण गेले तें पाहा. त्यांनीं मोजणी केली तों
योनाथान व त्याचा शस्त्रवाहक हे नव्हते. १८ तेव्हां
शौल अहीयास म्हणाला, देवाचा कोश इकडे आण.
देवाचा कोश त्या समयीं इस्राएल लोकांबरोबरच होता.
१९ शौल याजकाशीं बोलत असतां पलिष्ट्यांच्या
छावणींत गलबला वाढत चालला, तेव्हां शौल याजकास
म्हणाला, आपला हात काढ. २० मग शौल व त्याच्या-
बरोबरचे सर्व लोक एकत्र जमून लढाईस गेले; तेव्हां
प्रत्येकाची तरवार त्याच्या त्याच्या सोबत्यावर चालून
ते पराकाष्ठेचे घाबरून गेले; २१ आणि जे इब्री पूर्वी-
पासून पलिष्ट्यांबरोबर होते व जे चोहोंकडून त्यांच्या
छावणीस येऊन मिळाले होते तेहि शौल व योनाथान
यांजबरोबर असलेल्या इस्राएल लोकांस येऊन मिळाले.
२२ तसेंच जे इस्राएल लोक एफ्राइमाच्या डोंगराळ
प्रदेशांत लपून राहिले होते त्यांनीं जेव्हां ऐकलें कीं
पलिष्टी लोक पळत आहेत तेव्हां त्यांनींहि त्यांच्याशीं
लढून त्यांचा जबर पिच्छा पुरविला. २३ या प्रकारें
परमेश्वरानें त्या दिवशीं इस्राएल लोकांचा बचाव
केला आणि ते लढत लढत पलीकडे बेथ-आवेना-
पर्यंत गेले. २४ त्या दिवशीं इस्राएल लोक अति
क्लेश पावले; कारण शौलानें लोकांस शपथ घातली
होती कीं मला आपल्या शत्रूंचा सूड घ्यावयाचा आहे,
तर संध्याकाळपूर्वी जो कोणी अन्नास स्पर्श करील
त्याला शाप लागो; यास्तव त्याच्या लोकांपैकीं कोणीहि
अन्नास शिवला नाहीं. २५ मग सर्व लोक एका वनांत
आले; तेथें जमिनीवर मध होता. २६ लोक वनांत
आले तेव्हां मधाच्या धारा लागलेल्या त्यांनीं पाहिल्या.
पण कोणीहि तो हातांत घेऊन तोंडास लाविला नाहीं,
कारण लोकांस शपथेची भीति होती. २७ आपल्या
बापानें लोकांस शपथ घालून मनाई केली होती हें योना-

यानास ठाऊक नव्हतें; म्हणून त्यानें आपल्या हातांत
असलेल्या काठीचें टोक पुढें करून मधाच्या पोळ्यांत
खुपसलें; आणि मध हातांत घेऊन तोंडाशीं नेला;
तेव्हां त्याचे डोळे टवटवीत झाले. २८ एका मनुष्यानें
त्यास म्हटलें, तुमच्या बापानें लोकांस शपथ घालून
बजावून सांगितलें आहे कीं आज जो कोणी मनुष्य कांहीं
अन्न खाईल त्याला शाप लागो. लोक तर व्याकुळ झाले
होते. २९ योनाथान म्हणाला, माझ्या बापानें देश
कष्टी करून सोडिला आहे; मीं हा मध थोडासा
चाखिला तोंच माझे डोळे कसे टवटवीत झाले आहेत
पाहा; ३० तर शत्रूंकडून मिळालेल्या लुटींतून लोकांनीं
यथेच्छ खाल्लें असतें तर आज किती तरी बरें झालें
असतें; कारण पलिष्ट्यांचा संहार फारसा झाला नाहीं.
३१ त्या दिवशीं मिखमाशापासून अयालोनापर्यंत ते
पलिष्ट्यांस चोपीत गेले; पण ते अगदीं व्याकुळ झाले
होते; ३२ म्हणून ते लुटीवर तुटून पडले आणि मेंढरें,
बैल व वासरें जमिनीवर कापून रक्तासहित
खाऊं लागले. ३३ शौलास कोणीं सांगितलें कीं लोक
रक्तासहित मांस खाऊन परमेश्वराचा अपराध करीत
आहेत. तेव्हां तो म्हणाला, तुम्हीं विश्वासघात केला
आहे; एक मोठा दगड मजकडे लवकर लोटून आणा.
३४ शौल म्हणाला, लोकांमध्यें चोहोंकडे जाऊन त्यांस
सांगा कीं आपआपले बैल व मेंढरें माझ्याकडे घेऊन
या आणि येथेंच कापून खा; रक्तासुद्धां मांस खाऊन
परमेश्वराचा अपराध करूं नका. तेव्हां सर्व लोकांनीं
त्या रात्रीं आपआपले बैल • तेथें नेऊन कापिले.
३५ शौलानें परमेश्वराप्रीत्यर्थ एक वेदी बांधिली; ही
पहिलीच वेदी त्यानें परमेश्वराप्रीत्यर्थ बांधिली.

३६ शौल म्हणाला, आपण आज रात्रीं पलिष्ट्यांचा
पाठलाग करून सकाळपर्यंत त्यांस लुटूं; त्यांतला एक
मनुष्यहि सोडितां कामा नये. ते म्हणाले, आपणाला बरें
वाटेल तसें करा. त्या वेळीं याजकानें म्हटलें, चला, आपण
येथें देवासमीप जाऊं. ३७ शौलानें देवास विचारिलें, मी
पलिष्ट्यांचा पाठलाग करूं काय? तूं त्यांस इस्राएलांच्या
हातीं देशील काय? पण त्यानें त्या दिवशीं त्यास
उत्तर दिलें नाहीं. ३८ शौल म्हणाला, लोकनायकहो
इकडे या; आज कोणत्या प्रकारें हें पातक झालें आहे
याचा शोध करून पाहा. ३९ इस्राएलांस उद्धरणाऱ्या
परमेश्वराच्या जीविताची शपथ, हें पातक माझा पुत्र
योनाथान याकडून झालें असलें तरी तोहि अवश्य
मारिला जाईल; पण त्या लोकांपैकीं कोणीहि बोलेना.
४० मग त्यानें इस्राएल लोकांस सांगितलें, तुम्ही एके
बाजूस व्हा आणि मी व माझा पुत्र योनाथान दुसऱ्या
बाजूस होऊं. लोकांनीं शौलास म्हटलें, आपणाला बरें
वाटेल तसें करा. ४१ शौल इस्राएलाचा देव परमेश्वर
यास म्हणाला, खरें काय तें आम्हांस दाखवून दे.
तेव्हां योनाथान व शौल यांच्या नांवांची चिठी
निघाली आणि लोक सुटले ४२ शौल म्हणाला,
आतां माझी व माझा पुत्र योनाथान यांची चिठी
टाका. तेव्हां योनाथानाच्या नांवाची चिठी निघाली.
४३ शौल योनाथानास म्हणाला, तूं काय केलें तें मला
सांग. योनाथानानें सांगितलें, आपल्या हातांतील
काठीच्या टोकानें मीं थोडासा मध चाखिला खरा;
आतां मला मरणें प्राप्त आहे. ४४ शौल म्हणाला,
परमेश्वर असेंच करो, किंबहुना याहून अधिक करो;
योनाथाना, तुला अवश्य मेलें पाहिजे. ४५ तेव्हां
लोक शौलास म्हणाले, ज्यानें इस्राएलाचा एवढा
उद्धार केला तो योनाथान मारावयाचा काय? असें
कदापि होणें नाहीं; परमेश्वराच्या जीविताची शपथ,
त्याच्या डोक्यावरचा एक केसहि भूमीवर पडतां कामा
नये; कारण त्यानें आज परमेश्वराच्या पक्षानें कामगिरी
केली आहे. या प्रकारें लोकांनीं योनाथानाचा बचाव
केला, तो मेला नाहीं. ४६ शौल पलिष्ट्यांचा पाठलाग
करण्याचें सोडून परत गेला, आणि पलिष्टीहि आपल्या
ठिकाणीं गेले.

४७ इस्राएलावर राज्य स्थापीत केल्यावर शौलानें
मवाबी, अम्मोनी, अदोमी, सोबाचे राजे व पलिष्टी
यांशीं युद्ध केलें व जिकडेजिकडे तो जाई तिकडे-
तिकडे तो विजयी होई. ४८ त्यानें पराक्रम केला
आणि अमालेकी लोकांस पादाक्रांत करून इस्राएलास

जे जे लुटीत असत त्यांच्या हातांतून त्यांस सोडविलें.
४९ शौलाचे पुत्र योनाथान, इश्वी व मलकीशुवा
हे होते; त्याच्या दोन कन्यांचीं नांवें, मोठीचें नांव मेरब
व धाकटीचें नांव मीखल, अशीं होतीं. ५० शौलाच्या
स्त्रीचें नांव अहीनवाम असें होतें; ती अहीमास याची
कन्या. शौलाचा काका नेर याचा पुत्र अबनेर हा
सेनापति होता ५१ शौलाचा बाप कीश; अबनेराचा
बाप नेर हा अबियेलाचा पुत्र.

५२ शौलाच्या आयुष्यभर पलिष्ट्यांशीं बिकट
लढाई चालू राहिली; यास्तव शौलास कोणी पराक्रमी
अथवा शूर पुरुष आढळला तर तो त्यास आपल्या
पदरीं ठेवून घेई.

१५ १ शमुवेल शौलास म्हणाला, परमेश्वरानें
आपली प्रजा इस्राएल लोक यांजवर राजा
होण्यासाठीं तुला अभिषेक करावयास मला
पाठविलें होतें; तर आतां परमेश्वराचें म्हणणें ऐक.
२ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, इस्राएल मिसरांतून येत
असतां अमालेक मार्गांत त्यांजवर हल्ला करण्यासाठीं
टपून बसून त्यांशीं कसा वागला याचें मला स्मरण
आहे. ३ तर आतां जाऊन अमालेकास मार दे;
त्यांच्या सर्वस्वाचा विध्वंस कर, त्यांची गय करूं नको;
पुरुष, स्त्रिया, अर्भकें, तान्हीं बाळें, बैल, मेंढरें, उंट
आणि गाढवें या सर्वांचा संहार कर.

४ मग शौलानें लोकांस जमा करून तलाईम येथें
त्यांची मोजणी केली, तेव्हां दोन लक्ष पायदळ व
यहूदांतील दहा हजार पुरुष भरले. ५ नंतर शौल
अमालेक्यांच्या एका नगरापाशीं जाऊन खोऱ्यांत दबा
धरून बसला. ६ शौल केनी लोकांस म्हणाला, तुम्ही
अमालेक्यांमधून निघून जा, नाहीं तर त्यांच्याबरोबर
तुमचाहि संहार व्हावयाचा; कारण इस्राएल लोक
मिसरांतून आले तेव्हां तुम्ही त्यांशीं स्नेहानें वर्तलां. या-
वरून केनी अमालेक्यांतून निघून गेले. ७ मग शौलानें
हवीलापासून मिसरासमोरील शूराच्या मार्गापर्यंत
अमालेक्यांस मार देत नेलें. ८ त्यानें अमालेक्यांचा
राजा अगाग याला जीवंत पकडिलें, आणि सर्व
लोकांचा तरवारीनें निखालस संहार केला. ९ तरी पण
शौलानें व लोकांनीं अगागाला जीवंत राखिलें;
त्याचप्रमाणें उत्तम उत्तम मेंढरें, बैल, पुष्ट पशु,
कोकरें आणि जें जें कांहीं चांगलें होतें तें त्यांनीं
राखून ठेविलें; त्यांचा अगदीं नाश करावा असें त्यांस
वाटलें नाहीं, तर जें कांहीं टाकाऊ व कुचकामाचें
होतें त्याचाच त्यांनीं अगदीं नाश केला.

१० मग शमुवेलास परमेश्वराचें वचन प्राप्त झालें
कीं ११ मीं शौलास राजा केलें याचा मला पस्तावा
होत आहे; कारण मला अनुसरण्याचें सोडून देऊन त्यानें
माझ्या आज्ञा पाळिल्या नाहींत. यावरून शमुवेलास
संताप आला व तो रात्रभर परमेश्वराचा धावा करीत
राहिला. १२ सकाळीं अगदीं पहाटेस शमुवेल उठून
शौलास भेटावयास गेला; तेव्हां त्यास कोणीं सांगितलें
कीं शौल कर्मेलास आला आहे. एक विजयस्तंभ
उभारून चोहोंकडे फिरून तो गिल्गालास गेला आहे.
१३ शमुवेल शौलाकडे आला तेव्हां शौल त्यास
म्हणाला, परमेश्वर आपलें कल्याण करो; मीं परमे-
श्वराची आज्ञा पाळिली आहे. १४ शमुवेल म्हणाला,
तर शेरडांमेंढरांचें बेंबावणें आणि गुरांचें हंबरणें
माझ्या कानीं पडत आहे याचा अर्थ काय? १५ शौल
म्हणाला, लोकांनीं तीं अमालेक्यांपासून आणिलीं
आहेत; आपला देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ बलि
अर्पण करण्यासाठीं त्यांनीं उत्तम उत्तम मेंढरें व
गुरें राखून ठेविलीं आहेत; बाकी सर्वांचा आम्हीं
अगदीं नाश केला आहे. १६ शमुवेल शौलास
म्हणाला, पुरे कर; परमेश्वर मला रात्रीं काय म्हणाला
तें मी तुला सांगतों; तो म्हणाला, सांगा. १७ शमुवेल
म्हणाला, तूं आपल्या दृष्टीनें क्षुद्र होतास तरी तुला
इस्राएल कुळांचा नायक केलें ना? आणि तूं इस्राएलाचा
राजा व्हावें म्हणून परमेश्वरानें तुझा अभिषेक केला
ना? १८ मग परमेश्वरानें तुला मोहिमेवर पाठवून
सांगितलें कीं जा, त्या पापिष्ठ अमालेक्यांचा सर्वस्वीं
संहार कर, आणि ते नष्ट होत तोंपर्यंत त्यांजशीं
युद्ध कर; १९ असें असतां तूं परमेश्वराचा

शब्द कां ऐकला नाहीं ? तूं लुटीवर झडप घालून
परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें कां केलें ? २० शौल
शमुवेलास म्हणाला, मीं तर परमेश्वराचा शब्द पाळिला
आहे; परमेश्वरानें मला पाठविलें त्या मार्गानें मी
गेलों आणि अमालेक्यांचा अगदीं संहार करून
त्यांचा राजा अगाग यांस घेऊन आलों आहे; २१ पण
ज्या लुटीचा नाश करावयाचा होता तींतून लोकांनीं
उत्तम उत्तम वस्तु म्हणजे मेंढरें व गुरें हीं तुझा देव
परमेश्वर यास गिल्गाल येथें यज्ञ करण्यासाठीं राखून
ठेविलीं आहेत. २२ तेव्हां शमुवेल म्हणाला, परमे-
श्वराचा शब्द पाळिल्यानें जसा त्याला संतोष होतो
तसा होमांनीं व यज्ञांनीं होतो काय ? पाहा, यज्ञापेक्षां
आज्ञा पाळणें बरें; एडक्यांच्या वपेपेक्षां वचन ऐकणें
बरें. २३ अवज्ञा जादुगिराच्या पातकासमान आहे,
आणि हट्ट हा मूर्तिपूजा व कुलदेवतार्चन यांसारखा
आहे; तूं परमेश्वराचा शब्द मोडिला आहे म्हणून
त्यानेंहि तुला राजपदावरून झुगारून दिलें आहे.
२४ तेव्हां शौल शमुवेलास म्हणाला, मीं पाप केलें
आहे; मीं परमेश्वराच्या आज्ञेचें व आपल्या शब्दाचें
उल्लंघन केलें आहे; कारण मीं लोकांस भिऊन त्यांचें
म्हणणें ऐकलें. २५ तर आतां माझ्या पातकाची क्षमा
करा आणि माघारीं फिरून मजबरोबर या, म्हणजे मी
परमेश्वराची उपासना करीन. २६ शमुवेल शौलास
म्हणाला, मी तुजबरोबर परत येणार नाहीं; कारण तूं
परमेश्वराचा शब्द झुगारिला आहे, आणि परमेश्वरानें
इस्राएलावरील राजपदावरून तुला झुगारिलें आहे.
२७ शमुवेल जाऊं लागला तेव्हां त्यानें त्याच्या
झग्याचा काठ धरिला व तो फाटला. २८ तेव्हां शमुवेल
त्यास म्हणाला, परमेश्वरानें इस्राएलावरील तुझें राजपद
तुजपासून फाडून घेऊन तें तुझ्याहून जो बरा अशा
तुझ्या एका शेजाऱ्यास दिलें आहे. २९ जो इस्राएलाचें
केवळ वैभव आहे तो खोटें बोलणार नाहीं; तो पस्तावा
करावयाचा नाहीं, त्यास पस्तावा व्हावा असा तो
कांहीं मानव नाहीं. ३० मग तो म्हणाला, मीं तर
पाप केलेंच आहे; तरी पण आतां माझ्या प्रजेच्या
वडील जनांसमोर व इस्राएलासमोर माझा मान राखा
व मजबरोबर परत या म्हणजे आपला देव परमेश्वर याची
मी उपासना करीन. ३१ ह्यामुळें शमुवेल शौलामागून
परत गेला आणि शौलानें परमेश्वराची उपासना केली.

३२ मग शमुवेल म्हणाला, अमालेक्यांचा राजा
अगाग यास मजकडे घेऊन या. तेव्हां अगाग बेड्या
घातलेला असा त्याजकडे आला. अगागास वाटलें
होतें कीं आतां आपलें मरणसंकट खात्रीनें टळलें
आहे. ३३ शमुवेल त्यास म्हणाला, तुझ्या तरवारीनें
स्त्रिया जशा अपत्यहीन केल्या आहेत, त्याप्रमाणें तुझी
माता स्त्रियांमध्यें अपत्यहीन होईल. मग शमुवेलानें
गिल्गालांत परमेश्वरासमोर अगागाचे तुकडे तुकडे केले.

३४ मग शमुवेल रामा येथें गेला आणि शौल
आपलें नगर गिबा येथें स्वगृहीं गेला. ३५ शमुवेल
मरेपर्यंत पुनः शौलाच्या भेटीस गेला नाहीं; तरी
शमुवेल शौलासाठीं विलाप करीत असे; आणि आपण
शौलास इस्राएलावर राजा केलें याचा परमेश्वरास
अनुताप झाला.

**१६** १ मग परमेश्वरानें शमुवेलास म्हटलें, मीं
शौलास इस्राएलाच्या राजपदावरून झुगारून
दिलें आहे, तर तूं त्याच्यासाठीं कोठवर शोक
करीत राहणार ? शिंगांत तेल भरून चल; मी तुला
इशाय बेथलहेमकर याजकडे पाठवितों; कारण मीं
त्याच्या एका पुत्रास माझ्याकरितां राजा निवडिलें
आहे. २ शमुवेल म्हणाला, मी जाऊं कसा ? शौलानें
हें ऐकलें तर तो मला जिवें मारील. तेव्हां परमेश्वर
म्हणाला, तूं आपल्याबरोबर एक कालवड घेऊन जा
आणि सांग कीं मी परमेश्वराप्रीत्यर्थ यज्ञ करावयास
आलों आहें; ३ मग यज्ञास येण्याचें इशायास आमंत्रण
कर, म्हणजे तुला काय करावयाचें तें मी सांगेन; मी
तुला सांगेन त्याचा तूं मजसाठीं अभिषेक कर.
४ परमेश्वराच्या सांगण्याप्रमाणें शमुवेलानें केलें; व तो
बेथलहेमास गेला. तेव्हां त्या नगरांतले वडील जन
थरथर कांपत त्याला भेटावयास आले, व त्यांनीं

१ मुळांत: तेराफीम: उत्पत्ति ३१:१९ पाहा.

त्यास विचारिलें, आपण स्नेहभावानें आलां आहां काय?
५ तो म्हणाला, मी स्नेहभावानें आलों आहें; मी परमे-
श्वराप्रीत्यर्थ यज्ञ करण्यास आलों आहें; तुम्ही शुद्ध
होऊन मजबरोबर यज्ञास या. त्यानें इशाय व त्याचे
पुत्र यांस पवित्र होऊन यज्ञास येण्याचें आमंत्रण दिलें.
६ ते आले तेव्हां त्यानें अलीयाबास न्याहाळून पाहून
म्हटलें, परमेश्वरासमोर आलेला हाच परमेश्वराचा
अभिषिक्त होय; ७ पण परमेश्वरानें शमुवेलास म्हटलें,
तूं त्याच्या स्वरूपावर अथवा त्याच्या शरीराच्या उंच
काठीवर जाऊं नको, कारण मीं त्याला नापसंत केलें
आहे; मानवासारखें परमेश्वराचें पाहणें नसतें; मानव
बाहेरचें स्वरूप पाहतो पण परमेश्वर हृदय पाहतो.
८ मग इशायानें अबीनादाबास बोलावून शमुवेला-
पुढून चालविलें; पण शमुवेल म्हणाला, परमेश्वराला
हाहि पसंत नाहीं. ९ मग इशायानें शम्मा यास
त्याच्यापुढून चालविलें, पण शमुवेल म्हणाला, परमे-
श्वराला हाहि पसंत नाहीं. १० या प्रकारें इशायानें
आपले सात पुत्र शमुवेलापुढून चालविले. शमुवेलानें
इशायास म्हटलें, यांतला कोणीहि परमेश्वरानें पसंत
केला नाहीं. ११ शमुवेलानें इशायास विचारिलें, तुझे
सर्व पुत्र हजर आहेत काय? तो म्हणाला, एक सर्वांत
धाकटा राहिला आहे; तो पाहा, शेरडेंमेंढरें राखीत
आहे. तेव्हां शमुवेल इशायास म्हणाला, त्याला
बोलावणें पाठवून आण; तो येईपर्यंत आम्ही भोजनास
बसणार नाहीं. १२ त्यानें बोलावणें पाठवून त्यास
आणिलें. त्याचा वर्ण तांबूस, डोळे सुंदर व स्वरूप
मनोहर होतें. तेव्हां परमेश्वरानें त्यांस म्हटलें, ऊठ,
त्यास अभिषेक कर, हाच तो आहे. १३ मग शमुवेलानें
तेलाचें शिंग हातीं घेऊन त्याच्या भावांमध्यें त्यास
अभिषेक केला; आणि त्या दिवसापासून पुढें परमे-
श्वराचा आत्मा दाविदाचे ठायीं जोरानें संचरूं लागला.
नंतर शमुवेल उठून रामास गेला.

१४ इकडे परमेश्वराचा आत्मा शौलास सोडून
गेला आणि परमेश्वराकडून एक दुरात्मा त्यास बाधा
करूं लागला. १५ तेव्हां शौलाच्या सेवकांनीं त्यास
म्हटलें, पाहा, देवाकडील एक दुरात्मा आपणाला बाधा
करीत आहे. १६ तर तंतुवाद्य वाजविण्यांत निपुण
असा मनुष्य शोधून आणण्याची स्वामींनीं आपल्या
तैनातीच्या सेवकांस आज्ञा द्यावी; असें केल्यास देवा-
कडील दुरात्म्याची आपणाला बाधा होईल तेव्हां तो आपल्या
हातानें वाद्य वाजवील व आपणाला बरें वाटेल. १७ यावरून
शौल आपल्या सेवकांस म्हणाला, एक उत्तम वाद्य
वाजविणारा पाहून मजकडे घेऊन या. १८ तेव्हां
एका तरुण सेवकानें उत्तर केलें, पाहा, मीं बेथलेहेम-
कर इशाय याचा एक पुत्र पाहिला आहे; तो वादन-
कलेंत निपुण असून प्रबळ व युद्धकुशल वीर आहे,
तसाच तो चांगला वक्ता असून रूपवान् आहे, आणि
परमेश्वर त्याच्याबरोबर आहे. १९ हें ऐकून शौलानें
जासूद पाठवून इशायाला निरोप दिला कीं तुझा पुत्र
दावीद शेरडेंमेंढरें राखीत आहे त्याला मजकडे
पाठवून दे. २० मग इशायानें भाकरींनीं लादलेलें एक
गाढव, द्राक्षारसाचा एक बुधला व एक करडूं हीं घेऊन
आपला पुत्र दावीद याच्या हस्तें शौलाकडे पाठविलीं.
२१ दावीद शौलाकडे जाऊन त्याच्या सेवेस हजर
राहूं लागला; शौल त्याजवर फार प्रेम करूं लागला
व तो त्याचा शस्त्रवाहक झाला. २२ शौलानें इशायास
सांगून पाठविलें कीं दाविदास माझ्या तैनातीस राहूं
दे, कारण माझी त्याच्यावर मर्जी बसली आहे.
२३ जेव्हांजेव्हां देवाकडील दुरात्म्याची शौलास बाधा
होई तेव्हांतेव्हां दावीद वीणा घेऊन आपल्या हातानें
वाजवीत असे; मग शौलास चैन पडून बरें वाटत
असे, व तो दुरात्मा त्याला सोडून जात असे.

१७ १ पलिष्टी लोकांनीं युद्धासाठीं आपल्या सेना
एकवट केल्या आणि यहूदा देशांतील सोखो
या ठिकाणीं जमून सोखो व अजेका यांच्या
दरम्यान अफस-दम्मीन येथें छावणी दिली. २ इकडे
शौलानें आणि इस्राएल लोकांनींहि एकवट होऊन
एला नामक खोऱ्यांत तळ दिला, आणि पलिष्ट्यांशीं
युद्ध करावयास सैन्यरचना केली. ३ पलिष्टी एका
बाजूच्या पहाडावर उभे राहिले, व दुसऱ्या बाजूच्या

पहाडावर इस्राएल लोक उभे राहिले; त्या दोन
डोंगरांच्या मध्यें एक खोरें होतें. ४ तेव्हां गथ एथला
गल्याथ नामक एक महावीर पलिष्ट्यांच्या छावणींतून
बाहेर आला; त्याची उंची सहा हात एक वीत होती.
५ त्याच्या डोक्याला एक पितळी टोप होता व त्यानें
खवल्यांसारख्या पट्ट्यांचें कवच अंगांत घातलें होतें;
त्या कवचाचें वजन पांच हजार पितळी शेकेल होतें.
६ त्यानें पायांत पितळी मोजे चढविले होते, व
त्याच्या खांद्यांच्या दरम्यान एक पितळी बरची होती.
७ त्याच्या भाल्याचा दांडा साळ्याच्या तुरीसारखा होता;
त्याच्या भाल्याचें पातें सहाशें लोखंडी शेकेल होतें;
त्याची ढाल वाहणारा त्याच्यापुढें चालला होता.
८ तो उभा राहून इस्राएली सैन्यांस मोठ्यानें हाक
मारून म्हणाला, तुम्हीं येथें येऊन युद्धासाठीं सैन्य-
रचना कां केली आहे? मी पलिष्टी नव्हे काय? आणि
तुम्ही शौलाचे नोकर ना? तुम्ही आपल्यांतला एक
पुरुष निवडा, आणि त्यानें मजकडे यावें. ९ त्यानें
मजशीं लढून मला ठार मारिलें तर आम्ही तुमचे
दास होऊं; पण माझी त्याजवर सरशी होऊन मीं
त्यास मारिलें तर तुम्हीं आमचे दास होऊन आमची
सेवा करावी. १० तो पलिष्टी म्हणाला, इस्राएलाच्या
सर्व सैन्यांस मी कसपटासमान लेखीत आहें; कोणाहि
पुरुषास मजपुढें येऊं द्या, म्हणजे आम्ही दोघे युद्ध
करूं. ११ शौल व सर्व इस्राएल यांनीं त्या पलिष्ट्याचे
हे शब्द ऐकले तेव्हां त्यांचें धैर्य खचलें आणि ते
फार भयभीत झाले.

१२ आतां यहूदांतील बेथलहेमच्या इशाय नामक
एफ्राथ्याला दावीद नामें पुत्र होता. इशायास आठ
पुत्र होते. तो शौलाच्या कारकीर्दीत वृद्ध व वयातीत
झाला होता. १३ इशायाचे तीन वडील पुत्र शौला-
बरोबर लढाईस गेले होते; लढाईस गेलेल्या त्या
तीन पुत्रांचीं नांवें हीं: ज्येष्ठ पुत्र अलीयाब, दुसरा
अबीनादाब व तिसरा शम्मा. १४ सर्वांहून धाकटा
दावीद होता; तिन्ही वडील पुत्र शौलाबरोबर गेले
होते. १५ दावीद हा बेथलहेमांत आपल्या बापाचीं
शेरडेंमेंढरें राखण्यासाठीं शौलाकडून जातयेत असे.
१६ तो पलिष्टी चाळीस दिवसपर्यंत नित्य सकाळीं व
संध्याकाळीं जवळ येऊन उभा राहत असे.

१७ इशायानें आपला पुत्र दावीद यास म्हटलें,
एक एफाभर हुरडा व ह्या दहा भाकरी घेऊन छावणींत
आपल्या भावांकडे लवकर जा; १८ आणि पनेरीचे
दहा गोळे त्यांच्या सहस्रपतीस नेऊन दे; तुझे बंधु
कसे आहेत तें पाहून त्यांच्याकडून कांहीं खूण आण;
१९ शौल, तुझे भाऊ व सर्व इस्राएल लोक एला नामक
खोऱ्यांत पलिष्ट्यांशीं युद्ध करीत आहेत. २० दावीद
सकाळींच उठला व शेरडेंमेंढरें एका राखणाऱ्याच्या हवालीं
करून इशायानें त्यास सांगितल्याप्रमाणें सर्व वस्तु
घेऊन गेला; सेना रणशब्द करीत रणभूमीकडे चालली
असतां तो सैन्याच्या गाडेतळावर जाऊन पोहंचला.
२१ इस्राएलांनीं व पलिष्ट्यांनीं आपआपल्या सेना
समोरासमोर आणून युद्धास सज्ज केल्या. २२ दावीद
आपल्या सामानाचें गाठोडें सामानाची राखण कर-
णाऱ्यांच्या हवालीं करून धावत सैन्यांत गेला आणि
आपल्या भावांपाशीं जाऊन त्यानें त्यांचें क्षेमकुशल
विचारिलें. २३ तो त्यांजपाशीं बोलत असतां, पाहा,
पलिष्ट्यांच्या गोटांतून तो गथ येथील गल्याथ नांवाचा
पलिष्टी वीर तेथें चालून येऊन पूर्वोक्त शब्द बोलला
ते दाविदानें ऐकले. २४ त्या पुरुषास पाहतांच सर्व
इस्राएल लोक अत्यंत भयभीत होऊन त्याच्यापुढून
पळून गेले. २५ इस्राएल लोक म्हणूं लागले, हा चालून
आलेला पुरुष तुम्हीं पाहिला ना? तो इस्राएलाची
निर्भर्त्सना करावयास आला आहे; जो कोणी त्याला
ठार मारील त्यास राजा बहुत धन देऊन संपन्न
करील व आपली कन्या त्यास देईल, आणि इस्राएलांत
त्याच्या बापाचें घराणें स्वतंत्र करील. २६ आसपास
उभे असणाऱ्या लोकांस दाविदानें विचारिलें, या
पलिष्ट्यास मारून इस्राएलाची अप्रतिष्ठा दूर करणाऱ्या
मनुष्यास काय मिळेल? या असुंती पलिष्ट्यानें जीवंत
देवाच्या सेना तुच्छ लेखाव्या काय? २७ लोकांनीं
त्यास वरच्याप्रमाणें सांगितलें; म्हणजे जो कोणी त्याचा

वध करील त्यास अमुक अमुक मिळेल. २८ दावीद त्या
लोकांपाशीं भाषण करीत होता तें त्याचा वडील भाऊ
अलीयाब यानें ऐकलें; तेव्हां तो दाविदावर संतापून
म्हणाला, येथें आलास कशाला ? थोडीशीं शेरडेंमेंढरें
आहेत तीं रानांत तूं कोणाच्या हवालीं केलीं आहेत ?
तुझी घमेंड व तुझ्या मनाचा उद्दामपणा मी जाणून आहें;
तूं केवळ लढाई पाहण्यास येथें आला आहेस. २९ दावीद
म्हणाला, मीं काय केलें ? मी नुसता एक शब्द
बोललों ना ? ३० मग तो त्याच्यापासून निघून दुसऱ्या
एकाकडे गेला व तेथेंहि त्यानें तसेंच विचारिलें; तेव्हां
लोकांनीं पूर्वीप्रमाणेंच उत्तर दिलें. ३१ दावीद बोलला
ते शब्द ऐकल्यावर लोकांनीं ते शौलास कळविले; व
त्यानें त्यास बोलावूं पाठविलें. ३२ मग दावीद शौलास
म्हणाला, त्या पलिष्ट्यामुळें कोणाहि माणसाचें मन
कचरूं नये; आपला दास जाऊन त्याशीं लढेल. ३३ शौल
दाविदास म्हणाला, ह्या पलिष्ट्याशीं लढण्यास तूं समर्थ
नाहींस, कारण तूं केवळ तरुण आहेस, आणि तो
बाळपणापासून कसलेला योद्धा आहे. ३४ दावीद
शौलास म्हणाला, आपला दास आपल्या बापाचीं
शेरडेंमेंढरें राखीत असतां एक सिंह अस्वलासह येऊन
कळपांतील एक कोकरूं घेऊन गेला, ३५ तेव्हां मीं
त्याच्या पाठीस लागून त्यास मारिलें आणि कोकरास
त्याच्या जबड्यांतून सोडविलें; मजवर त्यानें झडप
घातली तेव्हां मीं त्याची दाढी धरून त्याला हाणून
ठार केलें. ३६ आपल्या दासानें त्या सिंहास व अस्वलास
मारून टाकिलें; हा असुंती पलिष्टी त्या दोहोंपैकीं एका-
सारखा ठरेल, कारण त्यानें जीवंत देवाच्या सेनांस
तुच्छ लेखिलें आहे. ३७ दावीद आणखी म्हणाला,
ज्या परमेश्वरानें मला सिंहाच्या व अस्वलाच्या पंजांतून
सोडविलें तोच मला ह्या पलिष्ट्याच्या हातांतून सोड-
वील. तेव्हां शौल दाविदास म्हणाला, जा, परमेश्वर
तुझ्याबरोबर असो. ३८ शौलानें आपला पेहराव
दाविदास लेवविला, त्याच्या मस्तकीं पितळी टोप
घातला व त्याच्या अंगांत चिलखत चढविलें.
३९ दावीद आपली तरवार आपल्या चिलखतावरून
बांधून चालून पाहूं लागला; कारण त्याला यापूर्वी
त्याचा सराव नव्हता. दावीद शौलास म्हणाला, हीं
लेऊन माझ्यानें चालवत नाहीं; कारण मला यांचा
सराव नाहीं; म्हणून दाविदानें तीं उतरून ठेविलीं.
४० मग त्यानें आपली काठी हातीं घेतली;
ओहोळांतून पांच गुळगुळीत गोटे वेचून आपल्या थैलींत
म्हणजे धनगरी बटव्यांत ठेविले, आणि आपली
गोफण हातीं घेऊन तो त्या पलिष्ट्याकडे गेला.
४१ तिकडे तो पलिष्टीहि दाविदाच्या जवळ
आला; त्याचा शस्त्रवाहक त्याच्यापुढें चालत होता.
४२ त्या पलिष्ट्यानें दाविदास न्याहाळून पाहिलें
तेव्हां तो त्यास तुच्छ वाटला; कारण तो केवळ
अल्पवयी असून तांबूस रंगाचा व सुकुमार होता.
४३ तो पलिष्टी दाविदास म्हणाला, मी काय कुत्रा
आहें म्हणून तूं काठी घेऊन मजपुढें आला आहेस ?
त्या पलिष्ट्यानें आपल्या देवांचीं नांवें घेऊन दाविदास
शिव्याशाप दिले. ४४ तो दाविदास म्हणाला, असा
जवळ ये म्हणजे तुझें मांस आकाशांतील पक्ष्यांस व
वनपशूंस देतों. ४५ तेव्हां दावीद पलिष्ट्यास म्हणाला,
तूं तरवार, भाला व बरची घेऊन मजवर चढून आला
आहेस; पण इस्राएली सैन्यांच्या देवाला तूं तुच्छ लेखिलें
आहे, त्या सेनाधीश परमेश्वराच्या नामानें मी तुजकडे
आलों आहें; ४६ आज परमेश्वर तुला माझ्या हातीं देईल;
मी तुझा वध करीन, व तुझें शिर धडापासून वेगळें
करीन. मी आज पलिष्टी सैनिकांचीं प्रेतें आकाशांतील
पक्ष्यांस व वनपशूंस देईन; तेव्हां इस्राएलामध्यें
देव आहे असें अखिल पृथ्वीस विदित होईल;
४७ आणि या सगळ्या समुदायास कळून येईल
कीं परमेश्वर तरवारीनें व भाल्यानें विजयी होतो
असें नाहीं; कारण हें युद्ध परमेश्वराचें आहे; तो
तुम्हांस आमच्या हातीं देईल. ४८ मग तो पलिष्टी
उठून दाविदाशीं सामना करावयास जवळ आला,
तेव्हां दावीद त्या पलिष्ट्याशीं सामना करावयास सैन्य
होतें त्या दिशेकडे त्वरेनें धावला. ४९ दाविदानें
आपल्या बटव्यांत हात घालून त्यांतून एक गोटा

घेऊन गोफणींत घातला, आणि ती गरगर फिरवून
पलिष्ट्याच्या मस्तकावर असा मारिला कीं तो त्याच्या
कपाळांत घुसून तो जमिनीवर पालथा पडला. ५० या
प्रकारें दाविदानें गोफणगुंडा घेऊन त्या पलिष्ट्यावर
सरशी केली आणि त्याचा वध केला; दाविदाच्या
हातीं तरवार नव्हती. ५१ दाविदानें धावून जाऊन
त्या पलिष्ट्याच्या छातीवर पाय दिला व त्याचीच तरवार
म्यानांतून काढून त्याला ठार करून त्याचें शिर छेदिलें.
आपला महावीर गत झाला हें पाहून पलिष्टी पळून
गेले. ५२ मग इस्राएल व यहूदी उठले आणि रणशब्द
करीत गथ व एक्रोन यांच्या वेशींपर्यंत पलिष्ट्यांचा
पाठलाग करीत गेले, आणि पलिष्टी शारईमाच्या वाटेंत
गथ व एक्रोन येथवर घायाळ होऊन पडले. ५३ मग
इस्राएल लोक पलिष्ट्यांचा पाठलाग करण्याचें सोडून
परत आले, व त्यांनीं त्यांची छावणी लुटिली.
५४ दाविदानें त्या पलिष्ट्याचें शिर यरुशलेमांत नेलें,
पण त्याचीं शस्त्रें त्यानें आपल्या डेऱ्यांत ठेविलीं.

५५ दावीद त्या पलिष्ट्यांशीं सामना करण्यास
गेला हें पाहून शौलानें आपला सेनापति अबनेर यास
विचारिलें, अबनेरा, हा तरुण पुरुष कोणाचा पुत्र ?
अबनेर म्हणाला; महाराज, आपल्या जीविताची शपथ,
मला ठाऊक नाहीं. ५६ राजानें म्हटलें, तो तरुण
पुरुष कोणाचा पुत्र आहे याचा तपास कर. ५७ दावीद
पलिष्ट्यास मारून परत आला तेव्हां त्याचें
शिर त्याच्या हातीं होतें; अबनेरानें त्याला तसेंच
नेऊन शौलापुढें उभें केलें. ५८ शौलानें त्यास
विचारिलें, हे तरुणा, तूं कोणाचा पुत्र ? तेव्हां दावीद
म्हणाला, आपला दास बेथलहेमकर इशाय याचा मी
पुत्र. १ दाविदाचें शौलाशीं भाषण संपलें

**१८** तेव्हां योनाथानाचें मन दाविदाच्या मनाशीं
इतकें जडलें कीं तो त्याला प्राणाप्रमाणें प्रिय
झाला. २ शौलानें त्या दिवशीं त्यास ठेवून घेतलें;
त्यास आपल्या बापाच्या घरीं जाऊं दिलें नाहीं. ३ मग
योनाथानानें दाविदाशीं आणभाक केली; कारण तो
त्यास प्राणाप्रमाणें प्रिय झाला होता. ४ योनाथानानें
आपल्या अंगावरचा झगा उतरून दाविदास दिला;
त्याप्रमाणें आपला पेहराव, तरवार, धनुष्य व
आपला कमरबंद हींहि दिलीं. ५ जिकडे जिकडे
शौल दाविदास पाठवी तिकडे तिकडे जाऊन तो
चतुराईनें कार्यसिद्धि करी; शौलानें त्यास योद्ध्यांवर
नेमिलें हें सर्व लोकांस पसंत वाटलें, तसेंच
शौलाच्या सेवकांसहि तें पसंत वाटलें.

६ त्या पलिष्ट्याचा वध करून दावीद परतल्यावर
लोक माघारीं येत असतां इस्राएलाच्या सर्व नगरांतून
स्त्रिया बाहेर निघाल्या आणि डफ व झांजा वाजवून
मोठ्या आनंदानें गात व नाचत शौल राजास
सामोऱ्या आल्या. ७ नृत्य करणाऱ्या स्त्रिया आळी-
पाळीनें येणेंप्रमाणें म्हणत :

शौलानें हजारों वधिले,
दाविदानें लाखों वधिले.

८ हें ऐकून शौलास फार क्रोध आला; हे त्याचे
शब्द त्यास आवडले नाहींत; तो म्हणाला, त्यांनीं
दाविदास लाखांचें यश दिलें व मला केवळ हजारांचें
यश दिलें; राज्य तेवढें खेरीज करून त्याला अधिक
मिळावयाचें तें काय राहिलें ? ९ त्या दिवसापासून
पुढें शौलानें दाविदावर डोळा ठेविला.

१० दुसऱ्या दिवशीं शौलाच्या ठायीं देवाकडील
दुरात्मा जोरानें संचरला, व तो आपल्या मंदिरांत
बडबडूं लागला; दावीद आपल्या नित्यक्रमाप्रमाणें वीणा
वाजवीत होता; आणि शौलाच्या हातीं भाला होता.
११ शौलानें त्याला मारावयास भाला उगारिला; तो
म्हणाला कीं भाला मारून दाविदाला भिंतीशीं खिळावें;
पण दावीद दोनदा त्याच्यासमोरून एकीकडे सरून
बचावला. १२ परमेश्वर दाविदाच्याबरोबर होता व
त्यानें शौलास सोडिलें होतें, यास्तव दाविदाचा शौलास
धाक असे. १३ मग शौलानें दाविदास आपल्यापासून
दूर करून सहस्रपति नेमिलें; तो लोकांच्या पुढें जातयेत
असे. १४ दावीद आपलीं सर्व कामें चतुराईनें
सिद्धीस नेत असे, आणि परमेश्वर त्याच्याबरोबर असे.
१५ दावीद मोठ्या चतुराईनें कार्यसिद्धि करीत असतो

हें पाहून शौलास त्याचा धाक वाटूं लागला; १६ तरी
पण सगळे इस्राएल व यहूदी दाविदावर प्रेम करीत,
कारण तो त्यांच्यापुढें जातयेत असे.

१७ शौल दाविदास म्हणाला, पाहा, माझी वडील
कन्या मेरब हिजशीं तुझें लग्न करून देतों; मात्र तुझा
पराक्रम माझ्याकरितां होऊं दे, आणि परमेश्वराच्या
वतीनें लढाया कर. आपला हात त्याजवर पडूं नये तर
पलिष्ट्यांचा हात त्याजवर पडावा असा त्याचा मानस
होता. १८ दावीद शौलास म्हणाला, राजाचा जांवई
व्हावें असा मी कोण ? माझें जीवित तें काय ?
आणि इस्राएलांत माझ्या बापाचें कूळ तें काय ?
१९ शौलाची कन्या मेरब हिचा या समयीं दाविदाशीं
विवाह व्हावयाचा होता तरी तो न होतां तिचा विवाह
अद्रीएल महोलाथी याशीं झाला. २० शौलाची
कन्या मीखल हिचें दाविदावर प्रेम जडलें; लोकांनीं
हें शौलास कळविलें, तेव्हां त्याला तें पसंत वाटलें.
२१ शौल म्हणाला, ती त्याला दिली म्हणजे ती त्याला
पाशरूप होईल, आणि पलिष्ट्यांचा हात त्याजवर पडेल;
यास्तव शौल दाविदास म्हणाला, या खेपेस तूं अवश्य
माझा जांवई होणार. २२ शौलानें आपल्या सेवकांस
आज्ञा दिली कीं दाविदास आंतून असें म्हणा कीं राजा
तुजवर प्रसन्न आहे; त्याचे सर्व सेवक तुजवर प्रेम
करितात, तर आतां तूं राजाचा जांवई हो. २३ शौलाच्या
सेवकांनीं दाविदाच्या कानावर हें घातलें तेव्हां तो
म्हणाला, मी केवळ निर्धन व तुच्छ असा मनुष्य
आहें, राजाचा जांवई होणें ही तुमच्या दृष्टीनें हलकी
गोष्ट आहे काय ? २४ शौलास त्याच्या सेवकांनीं
सांगितलें कीं दावीद असें असें म्हणाला. २५ तेव्हां
शौल म्हणाला, तुम्ही दाविदास जाऊन सांगा कीं
राजाला हुंडा नको; मात्र राजाच्या शत्रूंचा सूड
उगवावा म्हणून त्यास पलिष्ट्यांच्या शंभर अग्रत्वचा
हव्या आहेत. शौलाचा यांत असा हेतु होता कीं
अशानें तरी दावीद पलिष्ट्यांच्या हातून पतन पावेल.
२६ त्याच्या चाकरांनीं दाविदास हें सांगितलें तेव्हां
राजाचा जांवई होण्याचें त्यास पसंत वाटलें. लग्न-
सराईचे दिवस अजून संपले नव्हते; २७ तेव्हां दावीद
आपले लोक बरोबर घेऊन गेला व त्यानें पलिष्ट्यांचे
दोनशें पुरुष मारिले; दाविदानें त्यांच्या अग्रत्वचा
आणून राजाचा जांवई व्हावयासाठीं त्याला बरोबर
मोजून दिल्या, तेव्हां शौलानें आपली कन्या मीखल
हिचें त्याजशीं लग्न करून दिलें. २८ हें पाहून शौलाच्या
लक्षांत आलें कीं परमेश्वर दाविदाच्याबरोबर आहे.
त्याची कन्या मीखल हिचें त्याजवर प्रेम जडलें.
२९ तेव्हां दाविदाचा शौलास अधिकच धाक वाटूं
लागला, आणि तो दाविदाचा कायमचा वैरी बनला.

३० पलिष्ट्यांचे सरदार युद्धास सिद्ध झाले; जेव्हां
जेव्हां ते बाहेर निघत तेव्हां तेव्हां दावीद शौलाच्या
इतर सर्व सेवकांपेक्षां अधिक चतुराईनें यश संपादी,
यामुळें त्याच्या नांवाची ख्याति झाली.

**१९** १ शौलानें आपला पुत्र योनाथान व आपले
सर्व सेवक यांस सांगून ठेविलें कीं दाविदास
मारून टाकावें; पण शौलाचा पुत्र योनाथान
याचें दाविदावर फारच मन बसलें होतें; २ म्हणून
योनाथानानें दाविदास सांगितलें कीं माझा बाप शौल
तुला मारून टाकावयास पाहत आहे; तर तूं सकाळ-
पर्यंत सावध ऐस आणि एकाद्या गुप्त स्थळीं लपून राहा.
३ ज्या मैदानांत तूं असशील तेथें जाऊन मी
आपल्या बापासमोर हजर होईन व त्याजपाशीं तुझी
गोष्ट काढीन; मला कांहीं कमीजास्त दिसलें तर मी तें
तुला कळवीन. ४ योनाथानानें आपला बाप शौल
याजपाशीं दाविदाची प्रशंसा करून म्हटलें कीं राजानें
आपला दास दावीद याशीं गुन्हेगारी करूं नये, कारण
त्यानें आपला कांहीं अपराध केला नाहीं, उलट त्याचीं
सर्व कामें आपल्या हिताचीं झालीं आहेत; ५ त्यानें
आपलें शिर हातावर घेऊन त्या पलिष्ट्याचा संहार
केला आणि परमेश्वरानें इस्राएलाचा मोठा उद्धार केला
हें पाहून आपणाला आनंद झाला; असें आहे तर आपण
दाविदास विनाकारण मारून निर्दोष्याचा खून केल्याचें
पाप कां करितां ? ६ शौलानें योनाथानाचें म्हणणें
मान्य केलें; त्यानें आणभाक करून म्हटलें, परमे-

श्वराच्या जीविताची शपथ, त्याला जिवें मारावयाचें
नाहीं. ७ योनाथाननें दाविदास बोलावून आणून या
सगळ्या गोष्टी सांगितल्या; मग योनाथाननें दाविदास
शौलाकडे नेलें; आणि तो पूर्वीप्रमाणें शौलाच्या
तैनातीस राहिला.

८ इकडे युद्ध पुन्हां सुरू झालें तेव्हां दाविदानें
जाऊन पलिष्ट्यांशीं युद्ध केलें व त्यांचा मोठा संहार
केला व ते त्याच्यापुढून पळून गेले. ९ शौल हातीं
भाला घेऊन आपल्या मंदिरीं बसला असून दावीद
त्याच्यापुढें वाद्य वाजवीत असतां परमेश्वराकडील
दुरात्मा शौलाच्या ठायीं संचरला. १० दाविदास
भाल्यानें भोसकून त्याला भिंतीला खिळावें असा शौलानें
प्रयत्न केला पण तो शौलापुढून निसटून गेला व भाला
भिंतींत घुसून राहिला; तेव्हां त्या रात्रीं दावीद पलायन
करून निसटून गेला. ११ दाविदाच्या घरावर पहारा
ठेवून सकाळीं त्यास मारून टाकावें म्हणून शौलानें
तिकडे जासूद पाठविले; तेव्हां दाविदाची बायको
मीखल हिनें त्यास सांगितलें, आज रात्रीं आपण आपल्या
जिवाचा बचाव करणार नाहीं तर उद्यां ठार
व्हाल. १२ मग मिखलेनें खिडकींतून दाविदास
उतरविलें, व तो पळून जाऊन निभावला. १३ मिखलेनें
तेराफीम ( गृहदेवता ) घेऊन ती पलंगावर निजविली व
तिच्या डोक्याखालीं बकरीच्या केसांची उशी ठेवून ती
वस्त्रानें झाकिली. १४ शौलानें दाविदास पकडण्यासाठीं
जासूद पाठविले तेव्हां ती म्हणाली, तो आजारी आहे.
१५ मग शौलानें दाविदास प्रत्यक्ष पाहण्यासाठीं जासूद
पाठवून त्यांस सांगितलें कीं त्यास पलंगासुद्धां घेऊन
या; मी त्यास मारून टाकणार. १६ ते आंत येऊन
पाहतात तों पलंगावर गृहदेवतेची मूर्ति आहे आणि
तिच्या डोईखालीं बकरीच्या केसांची उशी आहे असें
त्यांस दिसून आलें. १७ शौल मिखलेस म्हणाला, तूं
मला असें कां फसविलें? तूं माझ्या शत्रूस पळूं देऊन
त्याला आपला बचाव कां करूं दिला? मीखल शौलास
म्हणाली, त्यानें मला म्हटलें कीं मला जाऊं दे, माझ्या
हातानें तू कां मरतेस?

१८ दावीद पळून निभावून रामास शमुवेलाकडे
गेला व जें कांहीं वर्तन शौलानें त्याशीं केलें तें अवघें
त्यानें त्याच्या कानीं घातलें. मग तो व शमुवेल नायोथ
येथें जाऊन राहिले. १९ दावीद रामांत नायोथ येथें
राहत आहे असें वर्तमान कोणीं शौलास सांगितलें;
२० तेव्हां शौलानें दाविदास पकडून आणण्यासाठीं
जासूद पाठविले; संदेष्ट्यांचें मंडळ भाषण करीत आहे
व शमुवेल त्यांच्यापुढें उभा आहे असें शौलाच्या
त्या जासुदांनीं पाहिलें तेव्हां देवाचा आत्मा त्यांचे ठायीं
संचरला व तेहि भाषण करूं लागले. २१ शौलास ही
बातमी लागली तेव्हां त्यानें दुसरे जासूद पाठविले, व
तेहि तसेंच भाषण करूं लागले. शौलानें तिसऱ्यांदा
जासूद पाठविले, तेहि भाषण करूं लागले. २२ मग
तो स्वतः रामास गेला, व सेखूंतल्या मोठ्या
हौदानजीक येऊन पोहंचल्यावर विचारूं लागला,
शमुवेल व दावीद कोठें आहेत? तेव्हां कोणी
सांगितलें, पाहा, रामांतील नायोथ येथें ते आहेत.
२३ त्यावरून तो तिकडे रामांत नायोथाकडे गेला;
तेव्हां देवाचा आत्मा त्याचे ठायीं संचरला व तो
रामांतील नायोथ येथें जाऊन पोहंचेपर्यंत भाषण करीत
चालला. २४ तो आपलीं वस्त्रें फेडून शमुवेलापुढें
भाषण करूं लागला, व अहोरात्र जमिनीवर उघडा
पडून राहिला. यावरून शौलहि संदेष्ट्यांपैकींच आहे
काय अशी म्हण पडली.

२० १ मग दावीद रामांतील नायोथ येथून
पळून गेला आणि योनाथानाकडे जाऊन म्हणूं
लागला, मीं काय केलें? मजकडून काय
अपराध घडला? तुझ्या बापाचा मीं असा काय
गुन्हा केला आहे कीं तो माझा जीव घ्यावयास पाहत
आहे? २ तो त्यास म्हणाला, असें कधीं न घडो; तूं
मारला जावयाचा नाहींस; माझा बाप लहानमोठें
कोणतेंहि काम मला सांगितल्यावांचून करीत नाहीं;
तर एवढीच गोष्ट मजपासून तो कां गुप्त ठेवील?
असें मुळींच होणें नाहीं. ३ दावीद प्रतिज्ञापूर्वक
म्हणाला, तुझी कृपादृष्टि मजवर आहे हें तुझ्या बापास

पक्कें ठाऊक आहे म्हणून तो म्हणतो कीं ही गोष्ट योना-
थानाला कळूं नये; कारण त्यास फार वाईट वाटेल;
बाकी परमेश्वराच्या जीविताची व तुझ्या जीविताची
शपथ, मजमध्यें व मृत्यूमध्यें केवळ एका पायरीचें
अंतर आहे. ४ योनाथान दाविदास म्हणाला,
तुझ्या जिवास वाटेल तें मी तुझ्यासाठीं करीन.
५ दावीद योनाथानास म्हणाला, पाहा, उद्यां चंद्रदर्शन
आहे व राजाच्या पंक्तीस बसून भोजन करावयाचें
मला चुकणार नाहीं; तर तूं मला जाऊं दे, म्हणजे मी
परवां संध्याकाळपर्यंत रानांत लपून राहीन. ६ तुझ्या
बापानें माझें नांव काढलेंच तर त्यास सांग कीं दाविदाला
आपला गांव बेथलहेम येथें तांतडीनें जावयाचें
होतें म्हणून त्यानें मोठ्या आग्रहानें मजजवळ रजा
मागितली; तेथें त्याच्या सगळ्या कुळाचा वार्षिक यज्ञ
आहे. ७ ठीक आहे असें जर तो म्हणाला तर तुझा
दास सलामत आहे असें समज, पण त्याला राग आला
तर कांहीं तरी घात करण्याचा त्याचा हेतु आहे असें
समज. ८ तर तूं आपल्या दासावर कृपा कर, कारण
तूं परमेश्वराची आण वाहून आपल्या दासाशीं करार
केला आहे; मजकडून कांहीं अपराध घडला असला
तर तूंच मला मारून टाक; आपल्या बापाकडे
मला कशाला नेतोस? ९ योनाथान म्हणाला, असें कधीं
व्हावयाचें नाहीं; माझ्या बापानें तुझा घात योजिला
तर त्याची चाहूल मला लागतांच मी तुला सांगावयाचा
नाहीं काय? १० दावीद योनाथानास म्हणाला,
तुझ्या बापानें तुला कडक जबाब दिला तर तें मला
कोण सांगणार? ११ योनाथान दाविदास म्हणाला, चल
आपण मैदानांत जाऊं. मग ते दोघे मैदानांत गेले.

१२ योनाथान दाविदास म्हणाला, इस्राएलाचा देव
परमेश्वर साक्षी, मी उद्यां अथवा परवां या सुमारास
माझ्या बापाचें मनोगत काढिल्यावर तुझ्या हिताचें
कांहीं असलें तर तावडतोब तुला सांगून पाठविणार
नाहीं काय? १३ तुझा घात करण्याचें माझ्या बापाच्या
मनांत असलें तर मी तुला तें विदित करून तूं
सलामत जावें म्हणून तुला मीं रवाना केलें नाहीं तर
योनाथानाचें असेंच, किंबहुना याहूनहि अधिक अनिष्ट
परमेश्वर करो; परमेश्वर जसा माझ्या बापाच्याबरोबर
आहे तसाच तो तुझ्याबरोबर असो. १४ माझा अंत
न व्हावा म्हणून मी जीवंत आहें तोंवर परमेश्वराच्या
सारखी कृपा तूं मजवर करावी. १५ एवढेंच नव्हे तर
माझ्या घराण्यावरून आपली कृपादृष्टि कदापि काढून
घेऊं नको; परमेश्वर दाविदाच्या प्रत्येक शत्रूचा
या भूतलावरून उच्छेद करील तेव्हांहि ती
काढून घेऊं नको. १६ ह्यामुळें योनाथानानें दाविदाच्या
घराण्याशीं आणभाक केली; तो म्हणाला, असें न
केल्यास परमेश्वर दाविदाच्या शत्रूंच्या हातून माझें
पारिपत्य करो. १७ योनाथानाची दाविदावर प्रीति होती
म्हणून त्यानें त्याला पुन: आणभाक करावयास लाविलें;
कारण तो त्याला प्राणासमान प्रिय होता. १८ योना-
थान त्यास म्हणाला, उद्यां चंद्रदर्शन आहे तर तुझी
जागा रिकामी पाहून तूं नाहींस असें समजून येईल.
१९ तीन दिवस झाल्यावर तावडतोब ये आणि तो प्रसंग
घडला त्या दिवशीं तूं ज्या जागीं लपून राहिला होतास
त्या जागीं एजेल नांवाच्या शिळेपाशीं राहा. २० मग
मी जणूं काय निशाण मारीत आहें असें दाख-
वून त्या दिशेकडे तीन बाण सोडीन. २१ मग पाहा,
मी पोरास सांगेन, जा, बाण शोधून आण; पाहा,
बाण तुझ्या अलीकडे आहेत ते घेऊन ये असें मी त्या
पोरास मोठ्यानें म्हणालों म्हणजे तूं ये; परमेश्वराच्या
जीविताची शपथ, तुझें कुशलच होईल, तुझें वाईट
कांहीं होणार नाहीं; २२ पण जर मी त्या पोरास म्हणालों
कीं बाण तुझ्या पलीकडे आहेत, तर तूं निघून जा.
कारण परमेश्वरानें तुला रवाना केलें आहे. २३ ज्या-
विषयीं तुझेंमाझें भाषण झालें आहे त्यासंबंधानें
तुझ्यामाझ्यामध्यें परमेश्वर निरंतर साक्षी असो.

२४ मग दावीद जाऊन मैदानांत लपला; चंद्र-
दर्शनाच्या दिवशीं राजा भोजनास बसला. २५ राजा
नेहमीप्रमाणें भिंतीजवळील आपल्या आसनावर
बसला; मग योनाथान आपल्या जागेवरून उठला
आणि अबनेर शौलाच्या बाजूस बसला; पण दाविदाची

जागा रिकामी होती. २६ शौल त्या दिवशीं कांहीं-
एक बोलला नाहीं; त्याला वाटलें कीं त्याला कांहीं
तरी झाल्यामुळें तो अशुचि झाला असेल; खात्रीनें
तो शुद्ध नसावा. २७ चंद्रदर्शनाच्या दुसऱ्या दिवशींहि
दाविदाची जागा रिकामीच होती; तेव्हां शौल आपला
पुत्र योनाथान यास म्हणाला, इशायपुत्र काल व आज
भोजनास कां आला नाहीं? २८ योनाथान शौलास
म्हणाला, दाविदानें बेथलहेमास जाण्यासाठीं मोठ्या
आग्रहानें माझ्यापाशीं रजा मागितली. २९ तो
म्हणाला, मला जाऊं दे, कारण त्या नगरांत आमचें
कूळ यज्ञ करणार आहे, आणि माझ्या भावानें मला तेथें
बोलाविलें आहे, तर आतां मजवर तुझी कृपादृष्टि
असेल तर मला जाऊं दे, म्हणजे मी आपल्या भावांस
भेटून येईन; यामुळेंच तो राजाच्या पंक्तीस आला
नाहीं. ३० तेव्हां शौलाचा कोप योनाथानावर
भडकला; तो त्यास म्हणाला, अरे दुष्ट, फितुरखोर
बायकोच्या पोरा, तुझी व तुझ्या आईची बेअब्रू व्हावी
म्हणून तुझें मन इशायपुत्रावर बसलें आहे हें मला
ठाऊक नाहीं काय? ३१ जोंवर हा इशायपुत्र या
भूतलावर जीवंत आहे तोंवर तुला व तुझ्या राज्याला
कधींहि स्थिरता प्राप्त व्हावयाची नाहीं; तर आतां
बोलावणें पाठवून त्याला मजकडे आण; त्याला अवश्य
मारून टाकावयाचें आहे. ३२ योनाथान आपला बाप
शौल यास म्हणाला, त्याला मारून कां टाकावयाचें?
त्यानें काय केलें आहे? ३३ तेव्हां शौलानें
योनाथानास मारण्यासाठीं भाला उगारिला; त्यावरून
तो समजला कीं दाविदास जिवें मारण्याचा आपल्या
बापाचा निश्चय झाला आहे. ३४ तेव्हां योनाथान
क्रोधानें संतप्त होऊन मेजावरून उठला आणि त्या
द्वितीयेस त्यानें अन्न खाल्लें नाहीं; आपल्या बापानें
दाविदाची अप्रतिष्ठा केली म्हणून त्याच्याबद्दल त्याला
फार खेद झाला.

३५ सकाळींच योनाथान आपल्याबरोबर एक
लहान पोर घेऊन मैदानांत दाविदाशीं संकेत केलेल्या
स्थळीं गेला. ३६ तो आपल्या पोरास म्हणाला, मी
बाण सोडितों ते धुंडून आण. तो पोर धावूं लागला
तेव्हां त्यानें त्याच्यापलीकडे जाईसा एक बाण
सोडिला. ३७ योनाथानानें सोडिलेल्या बाणाच्या
टप्प्यापाशीं तो पोर जाऊन पोहंचला तेव्हां योनाथान
त्यास ओरडून म्हणाला, बाण तुझ्या पलीकडे आहे
ना! ३८ योनाथान त्या पोरास म्हणाला, त्वरा कर,
धाव, विलंब लावूं नको. तेव्हां तो योनाथानाचा
पोर बाण जमा करून आपल्या धन्याकडे आला.
३९ त्या पोरास त्यांतलें कांहीं कळलें नाहीं; योनाथान
व दावीद यांसच ती गोष्ट माहीत होती. ४० योना-
थानानें आपलीं हत्यारें आपल्या पोरापाशीं देऊन
सांगितलें कीं हीं नगरांत पोंचीव. ४१ तो पोर
निघून जातांच दावीद दक्षिणेकडील एका ठिकाणा-
कडून उठून आला व त्यानें भूमीवर उपडें पडून
तीनदा नमन केलें; मग एकमेकांचें चुंबन घेऊन ते
रडूं लागले; दावीद तर मनस्वी रडला. ४२ तेव्हां
योनाथान दाविदास म्हणाला, सुखरूप जा; परमेश्वर
तुझ्यामाझ्यामध्यें आणि तुझ्यामाझ्या संततीमध्यें
निरंतर साक्षी असो; आपण दोघांनीं परमेश्वराच्या
नामानें आणभाक केली आहे बरें. मग तो उठून
चालता झाला व योनाथान नगरांत गेला.

२१ १ दावीद नोब येथें अहीमलेख याजकाकडे
आला; तेव्हां अहीमलेख थरथर कांपत
दाविदास सामोरा येऊन म्हणाला, तुम्ही एकटेच
कां? तुमच्याबरोबर कोणी मनुष्य नाहीं? २ दावीद
अहीमलेख याजकास म्हणाला, राजानें मला कांहीं काम-
गिरीवर पाठविलें आहे, आणि मला सांगितलें आहे कीं
ज्या कामगिरीवर मी तुला पाठवीत आहें आणि तुला
जी आज्ञा मी देत आहें तीविषयीं कोणास कांहीं कळूं
देऊं नको; मला अमुक ठिकाणीं येऊन मिळा असें मीं
आपल्या चाकरांस सांगितलें आहे. ३ तर आतां तुझ्या-
जवळ काय आहे? मला पांच भाकरी दे अथवा जें
कांहीं तुजजवळ असेल तें दे. ४ याजक दाविदास
म्हणाला, माझ्याजवळ साधारण भाकर नाहीं, तर
पवित्र भाकर आहे; तुझ्याबरोबरचे तरुण पुरुष मात्र

स्त्रियांपासून दूर राहिलेले असले पाहिजेत. ५ दाविदानें
याजकास म्हटलें, आम्ही वास्तविक आज तीन दिवस
स्त्रियांपासून दूरच आहों; आमचा प्रवास पवित्र कार्या-
साठीं नाहीं, तरी मी निघालों तेव्हां तरुण पुरुषांचीं
पात्रें पवित्र होतीं तीं आज किती जास्त असलीं
पाहिजेत? ६ तेव्हां याजकानें त्यास पवित्र भाकर
दिली; कारण त्या दिवशीं समर्पित ऊन भाकर
परमेश्वरासमोर ठेवण्यासाठीं जुनी भाकर तेथून
काढलेली होती; तीशिवाय-तेथें दुसरी भाकर नव्हती.
७ त्या दिवशीं तेथें दवेग नामक शौलाचा एक सेवक
परमेश्वरासमोर खोळंबून राहिला होता; तो अदोमी
असून शौलाच्या गुराख्यांचा प्रमुख होता. ८ मग
दावीद अहीमलेखास म्हणाला, येथें तुझ्यापाशीं एकादा
भाला किंवा तरवार आहे काय? राजाची कामगिरी
एवढ्या निकडीची होती कीं मीं आपली तरवार
किंवा आपलीं दुसरीं हत्यारें बरोबर आणिलीं नाहींत.
९ याजक म्हणाला, एला खोऱ्यांत गल्याथ पलिष्ट्याचा
तुम्ही वध केला त्याची तरवार आहे, ती मीं वस्त्रांत
गुंडाळून एफोदाच्यामागें ठेविली आहे; तुम्हांला पाहिजे
तर ती घ्या; तीशिवाय दुसरी कोणतीहि तरवार येथें
नाहीं. दावीद म्हणाला, तिच्यासारखी दुसरी तरवार
नाहीं, ती मला दे.

१० दावीद त्या दिवशीं निघून शौलाच्या भीतीनें
पळाला आणि गथाचा राजा आखीश याजकडे गेला.
११ आखीशास त्याचे सेवक म्हणाले, त्या देशाचा
राजा दावीद तो हाच ना?

शौलानें हजारों वधिले,
दाविदानें लाखों वधिले,

असें ज्याच्याविषयीं बोलून नाचत, गात होते तोच
ना हा? १२ दाविदानें हें बोलणें मनांत ठेविलें आणि
गथाचा राजा आखीश याचा त्याला फार धाक वाटला.
१३ तेव्हां त्यानें त्यांच्यापुढें आपली चालचर्या बदलून
वेड्याचें मिष केलें; तो फाटकाचीं कवाडें खडखडवूं
लागला व आपल्या दाढीवर लाळ गाळूं लागला.
१४ आखीश आपल्या सेवकांस म्हणाला, पाहा, हा
माणूस वेडा आहे हें तुम्हांस दिसतें ना? तुम्हीं त्यास
मजकडे कां आणिलें? १५ माझ्यापाशीं वेडी माणसें
काय कमी आहेत म्हणून तुम्हीं माझ्यासमोर वेडेचार
करावयाला याला आणिलें आहे? असला मनुष्य
माझ्या घरांत यावा काय?

२२ १ दावीद तेथून निसटून निघाला आणि
अदुल्लामाच्या गुहेंत गेला; हें ऐकून त्याचे भाऊ
व त्याच्या बापाच्या घरचीं सर्व माणसें त्या
गुहेंत त्याजकडे गेलीं. २ विपन्न, कर्जबाजारी व
जिवाला त्रासलेले असे सर्व लोक त्याजपाशीं जमा
झाले, तो त्यांचा नायक झाला; सुमारें चारशें पुरुष
त्याच्यापाशीं जमले.

३ तेथून दावीद मवाबांतील मिस्पा येथें जाऊन
मवाबाच्या राजास म्हणाला, परमेश्वर माझें काय
करणार हें मला समजेपर्यंत माझ्या आईबापांस येऊन
तुमच्यापाशीं राहूं द्या. ४ त्यानें त्यांस मवाबाच्या राजा-
समोर आणिलें; दावीद तेथल्या गढींत राहत होता
तोंपर्यंत तीं त्याजपाशीं राहिलीं. ५ गाद संदेष्टा
दाविदास म्हणाला, गढींत राहूं नको, येथून निघून
यहूदा देशांत जा. तेव्हां दावीद तेथून निघून हरेथ
नामक वनांत गेला.

६ दाविदाच्या व त्याच्याबरोबरच्या लोकांचा पत्ता
लागला आहे असें शौलानें ऐकलें; त्या समयीं तो
गिबा येथें एका उच्च जागीं चिंचेच्या झाडाखालीं हातीं
आपला भाला घेऊन बसला होता व त्याचे सर्व
सेवक त्याच्यासभोवतीं उभे होते. ७ तेव्हां शौल
आपल्या सभोवतालच्या सेवकांस म्हणाला, बन्यामिनी
लोकहो, ऐका; इशायाचा पुत्र तुम्हां सर्वांस शेतें व
द्राक्षांचे मळे देणार आहे काय आणि तो तुम्हां सर्वांस
सहस्रपति व शतपति करणार आहे काय? ८ म्हणून तुम्हीं
सर्वांनीं मजविरुद्ध कट केला असून माझ्या पुत्रानें इशाया-
च्या पुत्राशीं करार केल्याचें कोणीं माझ्या कानावर घातलें
नाहीं. आज माझ्या पुत्रानें माझ्या नोकरास माझा
घात करण्यासाठीं टपून बसण्यास चिथावलें असून
मला कोणीं कळविलें नाहीं व माझ्याबद्दल कोणास

वाईटहि वाटलें नाहीं ना ? ९ तेव्हां शौलाच्या
नौकरांवर नेमिलेला दवेग अदोमी म्हणाला, मीं
इशायाच्या पुत्रास नोब येथें अहीटूबाचा पुत्र अही-
मलेख याजकडे येतांना पाहिलें. १० त्यानें त्याच्या-
साठीं परमेश्वराकडे प्रश्न केला, त्यास अन्नसामग्री
पुरविली आणि गल्याथ पलिष्टयाची तरवार त्यास
दिली. ११ तेव्हां राजानें अहीटूबाचा पुत्र अहीमलेख
याजक यास आणि त्याच्या बापाच्या घराण्यांतील
सर्व मनुष्यें म्हणजे नोब येथें राहणारे सर्व याजक
यांस बोलावणें पाठविलें; तेव्हां ते सर्व राजाकडे आले.
१२ शौल म्हणाला, अहीटूबपुत्रा, ऐक; तो म्हणाला,
आज्ञा महाराज. १३ शौल त्यास म्हणाला, तूं व इशाया-
चा पुत्र अशा तुम्हीं दोघांनीं मजविरुद्ध कट केला
आहे; तूं त्यास भाकर व तरवार दिली आणि त्याच्यासाठीं
तूं परमेश्वराकडे प्रश्न केला व त्यामुळें तो आज मज-
विरुद्ध उठून माझा घात करूं पाहत आहे, याचें काय
कारण ? १४ अहीमलेखानें राजास उत्तर केलें,
आपल्या सर्व सेवकांमध्यें दाविदासारखा विश्वासू कोण
आहे ? तो तर राजाचा जांवई असून आपल्या मंत्रि-
मंडळांतला आहे, दरबारांत त्याची मोठी प्रतिष्ठा आहे.
१५ मी काय आजच पहिल्यानें त्याच्यासाठीं देवापाशीं
प्रश्न करूं लागलों काय ? असें मजकडून न घडो;
राजानें आपल्या ह्या सेवकास आणि माझ्या बापाच्या
सर्व घराण्यास असा बट्टा लावूं नये; कारण या प्रक-
रणीं आपल्या दासास अधिकउणें कांहींच माहीत नाहीं.
१६ राजा म्हणाला, अहीमलेखा, तुला व तुझ्या
बापाच्या घराण्यांतील सर्वांना अवश्य मेलें पाहिजे.
१७ तेव्हां जवळ प्यादे उभे होते त्यांस राजा
म्हणाला, चला, परमेश्वराच्या याजकांचा वध करा;
कारण ते दाविदाचे मिलाफी झाले आहेत; तो पळून
गेला हें त्यांस ठाऊक असूनहि त्यांनीं माझ्या कानावर
घातलें नाहीं; पण परमेश्वराच्या याजकांवर ते राजाचे
सेवक आपला हात टाकीनात. १८ तेव्हां राजा
दवेगास म्हणाला, चल, तूं जाऊन त्या याजकांवर
तुटून पड. तेव्हां अदोमी दवेग याजकांवर तुटून
पडला व त्या दिवशीं सणाचें एफोद धारण करणाऱ्या
पंचाऐशीं पुरुषांचा त्यानें वध केला. १९ नोबावर
तरवार चालवून पुरुष व स्त्रिया, मुलें व तान्हीं बाळें,
बैल, गाढवें व मेंढरें या सर्वांचा सप्पा त्यानें उडविला.
२० तरी पण अहीटूबपुत्र अहीमलेख याच्या पुत्रांपैकीं
अब्याथार नांवाचा एक पुत्र निभावून दाविदाकडे
पळून गेला. २१ शौलानें परमेश्वराच्या याजकांचा वध
केला हें वर्तमान अब्याथारानें दाविदास सांगितलें.
२२ दावीद अब्याथारास म्हणाला, ज्या दिवशीं अदोमी
दवेग तेथें होता त्याच दिवशीं मीं ताडिलें कीं हा निश्चयें
शौलास सांगेल; तुझ्या बापाच्या घराण्यांतल्या सर्व
माणसांच्या मरणास मी कारण झालों आहें. २३ भिऊं
नको, मजबरोबर राहा; कारण जो तुझा जीव घेण्यास
पाहत आहे, तो माझाहि जीव घेण्यास पाहत आहे;
माझ्यापाशीं तूं सुरक्षित राहशील.

२३ १ दाविदास बातमी लागली कीं पलिष्टी
लोक कईला नगराशीं लढत आहेत आणि
धान्याचीं खळीं लुटीत आहेत. २ तेव्हां दाविदानें
परमेश्वरास विचारलें, मी जाऊन ह्या पलिष्ट्यांवर मारा
करूं काय ? परमेश्वर त्यास म्हणाला, जा, पलिष्ट्यांवर
मारा करून कईलाचा बचाव कर. ३ दाविदाचे लोक
त्यास म्हणाले, पाहा, येथें यहूदांत जर आम्हांस भीति
आहे तर पलिष्ट्यांच्या सैन्यावर आम्ही कईलाकडे
चालून गेलों तर मग काय पुसावें ? ४ दाविदानें परमे-
श्वरापाशीं पुनः प्रश्न केला, तेव्हां परमेश्वरानें त्यास
सांगितलें, कमर बांधून कईलास जा; मी पलिष्ट्यांस
तुझ्या हातीं देतों. ५ मग दावीद व त्याचे लोक कईलास
गेले; त्यांनीं पलिष्ट्यांशीं युद्ध करून त्यांचीं गुरेंढोरें
हाकून आणिलीं आणि त्यांची मोठी कत्तल केली. या
प्रकारें दाविदानें कईला येथील रहिवाश्यांचें रक्षण केलें.

६ अहीमलेखाचा पुत्र अब्याथार हा कईला येथें
दाविदाकडे पळून गेला तेव्हां तो हातीं एफोद घेऊन गेला
होता. ७ दावीद कईला येथें गेला हें कोणीं शौलास कळ-
विलें तेव्हां तो म्हणाला, आतां देवानें त्यास माझ्या हातीं
दिलें आहे; कारण दरवाजे व अडसर असलेल्या नगरांत

जाऊन तो आयताच कोंडला आहे. ८ तेव्हां कईलास
जाऊन दाविदास व त्याच्या लोकांस घेरावें म्हणून
शौलानें आपल्या सर्व लोकांस युद्धास बोलाविलें. ९ शौल
आपला नाश करण्याची मसलत करीत आहे हें
दाविदास समजलें तेव्हां तो अब्याथार याजकास म्हणाला,
एफोद इकडे आण. १० त्या समयीं दावीद म्हणाला,
हे परमेश्वरा, इस्राएलाच्या देवा, शौल माझ्यामुळें
कईला नगराचा नाश करण्यासाठीं येऊं पाहत आहे, हें
वर्तमान तुझ्या दासानें नक्की ऐकलें आहे. ११ कईला
येथले लोक मला शौलाच्या हातीं देतील काय? तुझ्या
दासाच्या कानावर आलें आहे त्याप्रमाणें शौलाचें येणें
होईल काय? हे परमेश्वरा, इस्राएलाच्या देवा, तुला मी
विनवणी करीत आहें, तुझ्या दासाला काय तें सांग.
परमेश्वर म्हणाला, तो येईल. १२ दाविदानें विचारिलें,
कईलाचे लोक मला व माझ्या लोकांना शौलाच्या हातीं
देतील काय? परमेश्वर म्हणाला, होय देतील.
१३ तेव्हां दावीद व त्याचे सुमारें सहाशें लोक
कईलांतून निघून वाट फुटेल तिकडे गेले. दावीद
कईलाहून निसटून गेला हें शौलास कोणीं सांगितलें,
तेव्हां त्यानें निघण्याचें रहित केलें.

१४ मग दावीद रानांतील गढ्यांत राहूं लागला;
तो जीफ नांवाच्या रानांतील पहाडी प्रदेशांत राहिला.
शौल त्याचा शोध नित्य करीत असे; पण देवानें त्यास
त्याच्या हातीं लागूं दिलें नाहीं. १५ दाविदास कळून
चुकलें होतें कीं शौल आपला प्राण घेण्यास निघाला
आहे; दावीद जीफ नांवाच्या रानांत एका उंचवट्यावरील
झाडींत राहिला होता. १६ तेव्हां शौलाचा पुत्र योना-
थान हा निघून दाविदाकडे त्या उंचवट्यावरील झाडींत
गेला; देवाच्या ठायीं त्याचा भरंवसा दृढ करून त्याच्या
हाताला त्यानें बळकटी दिली. १७ त्यानें त्यास म्हटलें,
भिऊं नको; माझा बाप शौल याच्या हातीं तूं लागा-
वयाचा नाहींस; तूं इस्राएलाचा राजा होणार व मी
तुझा दुय्यम होणार; माझा बाप शौल यालाहि हें
ठाऊक आहे. १८ त्या दोघांनीं परमेश्वरापुढें करार
केला; मग दावीद त्या उंचवट्यावरील झाडींत राहिला
व योनाथान आपल्या घरीं गेला. १९ नंतर जिफी लोक
गिबा येथें शौलाकडे येऊन म्हणाले, रानाच्या दक्षिणेस
हकीलाच्या डोंगरांत उंचवट्यावरील झाडींतल्या गढ्यांत
आमच्याकडे दावीद लपून राहिला आहे ना? २० तर
आतां, महाराज, आपली तेथें येण्याची उत्कट इच्छा
आहे तीप्रमाणें या; राजाच्या हातीं त्याला देणें हें
आमचें काम. २१ शौल म्हणाला, परमेश्वर तुमचें
कल्याण करो; कारण तुम्हीं मजवर दया केली आहे;
२२ तुम्ही जाऊन आणखी खात्री करून घ्या; त्याची
बसण्याउठण्याची जागा कोठें आहे, तेथें तो कोणाच्या
दृष्टीस पडला, याची सगळी माहिती काढा; कारण तो
मोठा धूर्त आहे; २३ तो कोणकोणत्या जागीं दडी
मारून असतो त्या सगळ्या जागांची माहिती काढून
अवश्य परत या, म्हणजे मी तुम्हांबरोबर परत येईन; तो
या देशांत कोठेंहि असला तरी मी या यहूदाच्या
हजारो लोकांतून त्याला हुडकून काढीन. २४ मग ते
निघून शौलाच्या अगोदर जीफ येथें गेले; पण दावीद
व त्याचे लोक रानाच्या दक्षिणेस अराबांत मावोनाचें
अरण्य आहे तेथल्या मैदानांत होते. २५ शौल आपले
लोक बरोबर घेऊन त्याच्या शोधास गेला; ही बातमी
दाविदास समजली तेव्हां तो खडकाळींतून उतरून
मावोनाच्या रानांत जाऊन राहिला. हें शौलास समजलें
तेव्हां त्यानें मावोनाच्या रानांत दाविदाचा पाठलाग
केला. २६ शौल डोंगराच्या ह्या बाजूनें चालला आणि
दावीद व त्याचे लोक डोंगराच्या त्या बाजूनें चालले.
शौलाच्या भीतीनें दावीद निसटून जाण्याची त्वरा
करीत होता, कारण शौल व त्याचे लोक दाविदास व
त्याच्या लोकांस पकडण्यासाठीं त्यांस घेरूं पाहत होते.
२७ इतक्यांत एका जासुदानें शौलास येऊन सांगि-
तलें, चला, त्वरा करा, कारण पलिष्ट्यांनीं देशावर
स्वारी केली आहे. २८ तेव्हां शौल दाविदाचा पाठलाग
करण्याचें सोडून पलिष्ट्यांशीं सामना करण्यास गेला
म्हणून त्या ठिकाणाचें नांव सेला-हम्मालकोथ (निसटून
जाण्याचा खडक) असें पडलें. २९ दावीद तेथून
निघून एन-गेदीच्या गढ्यांत राहूं लागला.

२४ १ शौल पलिष्ट्यांचा पाठलाग करून परत
आला तेव्हां त्यास बातमी लागली कीं दावीद
एन-गेदीच्या रानांत आहे. २ तेव्हां शौल सर्व
इस्राएलांतून तीन हजार लोक निवडून घेऊन रान-
बकऱ्यांच्या खडकांवर दाविदाच्या व त्याच्या लोकांच्या
शोधास गेला. ३ वाटेनें जातांना तो एका मेंढवाड्या-
पाशीं आला, तेथें एक गुहा होती; तिच्या आंत शौल
बहिर्दिशेस गेला. गुहेच्या अगदीं आंतल्या बाजूस
दावीद व त्याचे लोक बसले होते. ४ तेव्हां दाविदास
त्याचे लोक म्हणाले, परमेश्वरानें आपणाला सांगितलें
होतें कीं पाहा, मी तुझा शत्रु तुझ्या हातीं देईन, मग
तुला वाटेल तसें त्याचें कर; हें घडून येण्याचा दिवस
आज प्राप्त झाला आहे. तेव्हां दाविदानें उठून
शौलाच्या झग्याचा कांठ हळूच कापून घेतला. ५ नंतर
शौलाच्या झग्याचा कांठ कापून घेतल्याबद्दल दाविदाचें
मन त्याला खाऊं लागलें. ६ तो आपल्या लोकांस
म्हणाला, मीं आपल्या स्वामीवर, परमेश्वराच्या अभि-
षिक्तावर, आपला हात टाकावा अशी गोष्ट परमेश्वर
मजकडून न घडवो, कारण तो परमेश्वराचा अभिषिक्त
आहे; ७ असें बोलून त्यानें आपल्या लोकांस आवरिलें;
त्यांस शौलावर हात टाकूं दिला नाहीं. मग शौल
गुहेंतून निघून मार्गस्थ झाला. ८ नंतर दावीदहि
उठून गुहेंतून बाहेर पडला आणि त्यानें मागून शौलास
हाक मारिली, माझे स्वामी महाराज. शौलानें मागें
वळून पाहिलें तेव्हां दाविदानें खालीं लवून त्यास मुजरा
केला. ९ दावीद शौलास म्हणाला, लोक म्हणतात कीं
पाहा, दावीद आपला घात करूं पाहत आहे; त्यांच्या
बोलण्याकडे आपण कां कान देतां? १० पाहा, आज आपण
आपल्या डोळ्यांनीं पाहिलें आहे कीं परमेश्वरानें आज
गुहेंत आपणाला माझ्या हातीं दिलें होतें; आपणाला मारून
टाकावें असें कोणीं म्हटलें, पण मीं आपली गय केली;
मीं म्हटलें कीं मीं आपल्या प्रभूवर हात टाकूं नये,
कारण तो परमेश्वराचा अभिषिक्त आहे. ११ शिवाय
माझ्या पित्या, पाहा, माझ्या हातांत आपल्या
झग्याचा कांठ आहे, आपल्या झग्याचा कांठ
मीं कापून घेतला, पण आपणाला जिवें मारिलें नाहीं;
यावरून निश्चयें समजा कीं माझ्या मनांत कांहीं दुष्ट हेतु
अथवा पातक नाहीं; आपला अपराध मीं केला नाहीं,
पण आपण माझा जीव घ्यावयास एकसारखे टपलां
आहां. १२ परमेश्वर माझ्यातुमच्यामध्यें न्याय करो
आणि परमेश्वरच मजबद्दल आपलें शासन करो; पण
माझा हात आपणावर पडावयाचा नाहीं. १३ प्राचीन
काळच्या लोकांची म्हण आहे कीं दुष्टांपासून
दुष्टता उद्भवते; तर माझा हात आपणावर पडणार
नाहीं. १४ इस्राएलाचा राजा कोणाचा पाठलाग
करण्यास निघाला आहे? कोणाच्या पाठीस आपण
लागलां आहां? एका मेलेल्या कुत्र्याच्या! एका
पिसवेच्या! १५ परमेश्वर न्यायाधीश आहे, तो माझ्या-
तुमच्यामध्यें निवाडा करो; माझें प्रकरण लक्षांत आणून
तो माझा कैवार घेवो, व माझा न्याय करून मला
आपल्या हातून सोडवो. १६ दाविदानें शौलाशीं हें
बोलावयाचें संपविल्यावर शौल म्हणाला, माझ्या पुत्रा
दाविदा, ही तुझीच वाणी काय? आणि शौल हेल
काढून रडूं लागला. १७ तो दाविदास म्हणाला, तूं
मजहून नीतिमान् आहेस; तूं तर मजशीं भलाईनें
वागलास, पण मी तुजशीं बुराईनें वागलों. १८ तूं
मजशीं भलाईनें वागलास याचें प्रमाण तूं आज
दाखविलें आहे, कारण परमेश्वरानें मला तुझ्या हातीं
दिलें असून तूं मला मारून टाकिलें नाहीं.
१९ कोणाच्या तावडींत त्याचा शत्रु सांपडला तर तो
त्याला सलामत जाऊं देईल काय? म्हणून आज तूं जें
वर्तन मजशीं केलें आहे त्याबद्दल परमेश्वर तुझें
बरें करो. २० पाहा, मला हें ठाऊक आहे कीं तूं
खात्रीनें राजा होणार आणि इस्राएलाचें राज्य तुझ्या
हातीं कायम राहणार. २१ तर आतां मजजवळ
परमेश्वराच्या नामानें अशी आणभाक कर कीं तूं
माझ्या पश्चात् माझ्या वंशाचा उच्छेद करणार
नाहींस, आणि माझ्या बापाच्या घराण्यांतून माझी
नांवनिशाणी नाहींशी करणार नाहींस. २२ तेव्हां
दाविदानें शौलाजवळ अशीच आणभाक केली;

मग शौल आपल्या घरीं गेला आणि दावीद आपल्या
लोकांसह गडावर गेला.

## २५

१ पुढें शमुवेल मृत्यु पावला; तेव्हां सर्व
इस्राएल लोकांनीं एकत्र जमून शोक केला
आणि रामा येथील त्याच्या घरांत त्यास
मूठमाती दिली. इकडे दावीद निघून पारान नांवाच्या
अरण्यांत गेला.
२ मावोन येथें एक मनुष्य होता, तो आपला
व्यवहार कर्मेल येथें चालवीत असे; तो माणूस मोठा
मातबर असून त्याचीं तीन हजार मेंढरें व एक हजार
बकरीं होतीं; तो कर्मेलांत आपल्या मेंढ्यांची लोकर
कातरीत होता. ३ त्याचें नांव नाबाल असें होतें व
त्याच्या स्त्रीचें नांव अबीगईल असें होतें; ती स्त्री
बुद्धिमती व रूपवती होती; परंतु तो पुरुष कठोर व
वाईट चालीचा होता; तो कालेब वंशांतला होता.
४ नाबाल आपल्या मेंढरांची लोकर कातरीत असल्याचें
दाविदानें अरण्यांत ऐकलें. ५ तेव्हां दाविदानें दहा
तरुण पुरुषांस तेथें पाठविलें; त्यानें त्या तरुणांस
सांगितलें कीं कर्मेल येथें नाबालाकडे जाऊन त्यास
माझा सलाम सांगा; ६ त्या सुखसंपन्न पुरुषास म्हणा
कीं आपलें, आपल्या घराण्याचें व आपल्या सर्वस्वाचें
कुशल असो. ७ मीं असें ऐकलें आहे कीं आपण लोकर
कातरणारे लाविले आहेत; आपले धनगर आमच्यामध्यें
होते; आम्हीं त्यांस कांहीं उपद्रव दिला नाहीं, आणि
ते कर्मेलांत असतांना त्यांची कांहींएक हानि झाली
नाहीं. ८ आपल्या चाकरांस विचारा म्हणजे ते आपल्याला
सांगतील; तर या तरुण पुरुषांवर कृपादृष्टि करा; आम्ही
आनंदाच्या दिवशीं आलों आहों; तर आपला हात चालेल
तेवढें आपल्या दासांस व आपला पुत्र दावीद यास द्या.
९ दाविदाच्या तरुण पुरुषांनीं जाऊन त्याच्या नांवानें
नाबालास हे सर्व शब्द सांगितले व ते स्तब्ध राहिले.
१० नाबालानें दाविदाच्या सेवकांस म्हटलें, दावीद
कोण? हा इशायाचा पुत्र कोण? आजकाल बहुत दास
आपआपल्या धन्याला सोडून पळून जातात; ११ माझें
अन्न, माझें पाणी आणि माझ्या कातरणाऱ्यांसाठीं
मारिलेल्या पशूंचें मांस जे कोण, कोठले, हें मला ठाऊक
नाहीं असल्या लोकांस मी देऊं काय? १२ तेव्हां
दाविदाच्या तरुण पुरुषांनीं आल्या वाटेनें माघारे
जाऊन हे सर्व शब्द जशाचे तसे दाविदाला सांगितले.
१३ तेव्हां दावीद आपल्या लोकांस म्हणाला, आपल्या
तरवारी आपल्या कंबरांस बांधा; आणि त्या प्रत्येकानें
आपआपली तरवार आपल्या कंबरेस बांधिली;
दाविदानेंहि आपली तरवार कंबरेस बांधिली; दाविदा-
बरोबर चारशें पुरुष गेले, आणि दोनशें पुरुष सामाना-
सुमानाजवळ राहिले. १४ इकडे एका चाकरानें नाबालाची
स्त्री अबीगईल हिला सांगितलें कीं दाविदानें रानांतून
आमच्या स्वामींचें क्षेमकुशल विचारण्याकरितां जासूद
पाठविले होते, पण तो त्यांच्या अंगावर ओरडला.
१५ हे लोक आम्हांशीं चांगल्या रीतीनें वागले आणि
आम्ही मैदानांत होतों तोंवर त्यांचें आमचें दळण-
वळण होतें; त्या वेळीं त्यांनीं आम्हांस कांहीं
उपद्रव केला नाहीं व आमची कांहीं हानि झाली
नाहीं. १६ आम्ही त्यांच्याबरोबर शेरडेंमेंढरें
राखीत होतों तोंवर ते रात्रंदिवस आम्हांस तटबंदी-
सारखे होते. १७ तर आतां काय करावयाचें
याचा चांगला विचार करा; कारण आमच्या धन्यावर
व त्याच्या सर्व घराण्यावर अरिष्ट येणार आहे, आणि धनी
तर असा अधम आहे कीं त्याला बोलण्याची कोणाची
छाती नाहीं. १८ तेव्हां अबीगईल हिनें मोठ्या दोनशें
भाकरी, द्राक्षारसाचे दोन बुधले, पांच मेंढरांचें रांधिलेलें
मांस, पांच मापें हुरडा, खिसमिसांचे शंभर घड आणि
अंजिरांच्या दोनशें ढेपा हीं सर्व घेऊन गाढवांवर
लादलीं. १९ ती आपल्या चाकरांस म्हणाली, तुम्ही
पुढें चला, मी तुमच्यामागून येत्यें. याविषयीं तिनें
आपला नवरा नाबाल यास कांहीं सांगितलें नाहीं.
२० ती गाढवावर बसून डोंगराच्या आडोशानें जात
असतां दावीद व त्याचे लोक समोरून येत होते ते तिला
भेटले. २१ दावीद म्हणाला होता कीं मीं रानांत या
मनुष्याच्या सर्व मालमत्तेचें रक्षण करून त्याची कांहींएक
हानि होऊं दिली नाहीं तें खरोखर व्यर्थ गेलें; त्यानें

उपकाराबद्दल अपकार केला; २२ तर सकाळीं उजाडे-
पर्यंत त्याच्या लोकांपैकीं एकहि पुरुष मी जीवंत राहूं
देणार नाहीं; परमेश्वर माझ्या सर्व शत्रूंचें असेंच व
याहूनहि अधिक वाईट करो. २३ अबीगईल दाविदास
पाहून झटकन गाढवावरून उतरली व दाविदापुढें
जमिनीवर उपडी पडून तिनें दंडवत घातलें. २४ ती
त्याच्या पायां पडून म्हणाली, अहो माझे स्वामी, हा
अपराध माझ्याच शिरीं असूं द्या; आपल्या दासीस आपल्या
कानांत कांहीं सांगूं द्या; आपल्या दासीचें बोलणें ऐका.
२५ माझ्या स्वामींनीं त्या अधम नाबालाचें कांहींएक
मनांत आणूं नये; तो आपल्या नांवासारखाच आहे;
त्याचें नांव नाबाल (मूर्ख) असें आहे, आणि
त्याच्या ठायीं मूर्खपणा आहे; ज्या तरुण पुरुषांस
माझ्या स्वामींनीं पाठविलें होतें त्यांस मीं पाहिलें
नाहीं. २६ तर आतां, अहो माझे स्वामी, परमे-
श्वराच्या जीविताची शपथ व आपल्या जीविताची शपथ,
परमेश्वरानें आपणाला रक्तपात करण्यापासून व आपल्या
हातानें सूड घेण्यापासून आवरिलें आहे; म्हणून
आतां आपले शत्रु व माझ्या स्वामींची हानि चिंतिणारे
यांचें नाबालासारखें होवो. २७ मीं आपल्या दासीनें
आपल्या स्वामींकडे जी ही भेट आणिली आहे
ती माझ्या स्वामींबरोबरच्या तरुणांना द्यावी.
२८ आपल्या ह्या दासीचा अपराध क्षमा करा; कारण
परमेश्वर खरोखर माझ्या स्वामींचें घराणें कायमचें
वसवील; कारण माझे स्वामी परमेश्वराच्या लढाया
लढत आहेत; आपल्या सर्व आयुष्यभर आपल्या ठायीं
कसलेंहि अनिष्ट आढळावयाचें नाहीं. २९ एक मनुष्य
आपला पाठलाग करावयास व आपला प्राण घ्यावयास
उठला आहे, तरी माझ्या स्वामींचा प्राण आपला देव परमे-
श्वर याजपाशीं जीवंतांच्या समूहांत बांधिलेला राहील, आणि
आपल्या शत्रूंचे प्राण तो जसे काय गोफणींत घालून
गोफणून टाकील. ३० आपणाविषयीं जें कांहीं परमेश्वरानें
म्हटलें आहे तदनुसार माझ्या स्वामींचें कल्याण करून
आपणाला परमेश्वरानें इस्राएलाचा अधिपति नेमिल्यावर,
३१ आपण विनाकारण रक्तपात केल्याचा किंवा कोणाचा
सूड उगविल्याचा आपल्याला पस्तावा व्हावयाचा नाहीं,
किंवा माझ्या स्वामींच्या मनाला खेद व्हावयाचा नाहीं; तर
परमेश्वर माझ्या स्वामींचें कल्याण करील तेव्हां आपल्या
दासीची आठवण करा. ३२ दावीद अबीगइलेस
म्हणाला, ज्यानें तुला आज माझ्या भेटीस पाठविलें
तो इस्राएलाचा देव परमेश्वर धन्य! ३३ धन्य तुझ्या
दूरदर्शीपणाची! तूं स्वतः धन्य! तूं आज मला आपल्या
हातानें रक्तपात करण्यापासून व सूड उगविण्यापासून
आवरिलें आहे; ३४ वस्तुतः इस्राएलाचा देव
परमेश्वर यानें तुला उपद्रव करण्यापासून मला आवरिलें
आहे; त्याच्या जीविताची शपथ, तूं मला तांतडीनें
भेटावयास आली नसतीस तर खरोखर सकाळीं उजाडे-
पर्यंत नाबालाचा एक पुरुषहि जीवंत राहिला नसता.
३५ नंतर तिनें जें कांहीं आणिलें होतें त्याचा स्वीकार
करून दावीद तिला म्हणाला, आपल्या घरीं सुखानें
जा; पाहा, मीं तुझा शब्द ऐकला आहे व तुझी विनंति
मान्य केली आहे. ३६ मग अबीगईल नाबालाकडे
गेली, तों त्यानें आपल्या घरीं राजाच्यासारखी
मेजवानी केली आहे असें तिनें पाहिलें; त्याचें चित्त
रमून गेलें होतें; तो फार झिंगला होता; यास्तव
सकाळीं उजाडेपर्यंत तिनें त्याला कमीजास्त कांहीं
सांगितलें नाहीं. ३७ सकाळीं नाबालाची निशा उतरल्या-
वर त्याच्या स्त्रीनें ह्या सर्व गोष्टी त्यास सांगितल्या;
तेव्हां त्याचें हृदय मृतवत् झालें, तो पाषाणासारखा
झाला. ३८ नंतर दहा दिवसांनीं परमेश्वराकडून
नाबालास असा तडाका मिळाला कीं तो मृत्यु पावला.
३९ नाबालाच्या मृत्यूचें वृत्त ऐकून दावीद म्हणाला,
नाबालाच्या हातून माझी अप्रतिष्ठा झाली तिची दाद
ज्यानें घेतली आणि आपल्या दासास घात करण्यापासून
आवरिलें, तो परमेश्वर धन्य! परमेश्वरानें नाबालाचें
दुष्कर्म त्याच्याच शिरीं उलटविलें. मग दाविदानें
अबीगइलेशीं लग्नाचें बोलणें करण्याकरितां तिच्याकडे
लोक पाठविले. ४० दावीदाचे चाकर कर्मेल येथें
अबीगइलेकडे येऊन तिला म्हणाले, तुला आपली
स्त्री करावयासाठीं घेऊन या म्हणून दाविदानें

तुजकडे आम्हांस पाठविलें आहे. ४१ ती उठून भूमी-
पर्यंत लवून म्हणाली कीं आपली दासी माझ्या स्वामीच्या
दासांचे चरण धुणारी दासी होण्यास सिद्ध आहे.
४२ मग अबीगईल तांतडीनें उठून गाढवावर बसली;
तिच्या पांच सख्या तिच्याबरोबर गेल्या; ती
दाविदाच्या जासुदांमागून जाऊन त्याची स्त्री झाली.
४३ दाविदानें इज्रेलकरीण अहीनवाम, हीहि एक
बायको केली; अशा या दोघी त्याच्या स्त्रिया झाल्या.
४४ शौलानें आपली कन्या मीखल, जी दाविदाची
स्त्री होती, तिला गल्लीमवासी लइशाचा पुत्र पाल्ती
यास देऊन टाकिलें होतें.

२६ १ मग जिफी लोक गिबा येथें शौलाकडे
जाऊन म्हणाले, रानासमोरील हकीला डोंगरांत
दावीद लपून राहिला आहे ना? २ तेव्हां
शौल इस्राएलांतले तीन हजार निवडक योद्धे बरोबर
घेऊन दाविदाचा शोध करावयास जीफ रानांत
निघून गेला. ३ शौलानें आपली छावणी रस्त्याच्या
बाजूला रानासमोरल्या हकीला डोंगरावर केली.
दावीद त्या रानांत राहत होता; शौल आपला
पाठलाग करीत रानांत आला आहे हें त्यास समजलें.
४ तेव्हां दाविदानें हेर पाठवून शौल खरोखरच
आला आहे कीं काय याची माहिती काढिली. ५ मग
दावीद उठून जेथें शौलाचा तळ पडला होता तेथें
निघून गेला; तेथें शौल व त्याचा सेनापति नेराचा
पुत्र अबनेर हे निजले होते तें स्थळ त्यांनीं पाहिलें.
शौलाच्या सभोंवतीं गाडेतळ होता, आणि लोकांनीं
त्याच्या सभोंवार आपले डेरे दिले होते. ६ तेव्हां
दाविदानें अहीमलेख हित्ती आणि यवाबाचा भाऊ
सरूवेचा पुत्र अबीशय यांस म्हटलें, माझ्याबरोबर त्या
छावणींत शौलाकडे येण्यास कोण तयार आहेत?
अबीशय म्हणाला, मी आपल्याबरोबर येतों. ७ तेव्हां
दावीद व अबीशय त्या लोकांजवळ रात्रीचे गेले; तेथें
जाऊन पाहतात तों शौल गाडेतळाच्या आड निजला
आहे, त्याच्या उशाजवळ त्याचा भाला भूमींत
रोवलेला, आणि अबनेर व इतर लोक त्याच्या
सभोंवार निजले आहेत असें त्यांच्या दृष्टीस पडलें.
८ तेव्हां अबीशय दाविदास म्हणाला, देवानें आज
आपला शत्रु आपल्या हातीं दिला आहे; तर आतां मला
त्याच्या भाल्यानें त्याजवर एकच वार असा करूं द्या कीं
तो त्यास भेदून जमिनींत शिरेल; भाला पुनः मारण्याची
जरूरच पडणार नाहीं. ९ दावीद अबीशयास
म्हणाला, त्याचा वध करूं नको; परमेश्वराच्या
अभिषिक्तावर हात चालवून कोण निर्दोष राहणार?
१० दावीद आणखी म्हणाला, परमेश्वराच्या जीविताची
शपथ, परमेश्वरच त्यास मारील अथवा त्याचा काळ
आला म्हणजे तो मरेल अथवा युद्धांत त्याचा अंत
होईल. ११ परमेश्वराच्या अभिषिक्तावर आपला
हात टाकावयाचें मजकडून न घडो; पण आतां त्याच्या
उशाजवळ असलेला भाला आणि पाण्याचा चंबू घे;
मग आपण निघून जाऊं. १२ तेव्हां दाविदानें
शौलाच्या उशाजवळून भाला आणि पाण्याचा चंबू
उचलून घेतला, आणि ते निघून गेले. ते निघून
गेले तेव्हां कोणीं त्यांस पाहिलें कीं ओळखलें नाहीं व
कोणी जागाहि झाला नाहीं. ते सर्व निद्रिस्त होते;
परमेश्वरानें त्यांस गाढ निद्रा लाविली होती. १३ मग
दावीद पलीकडील बाजूस एका दूरच्या टेकडीच्या
माथ्यावर उभा राहिला; त्यांच्यामध्यें बरेंच अंतर
होतें. १४ दावीद त्या लोकांस आणि नेराचा
पुत्र अबनेर यास मोठ्यानें हाक मारून म्हणाला,
अबनेरा, ओ कां देत नाहींस? तेव्हां अबनेरानें
म्हटलें, राजास हाक मारणारा असा तूं कोण आहेस?
१५ दावीद अबनेरास म्हणाला, तूं मर्द आहेस ना?
इस्राएलांत तुझ्या तोडीचा कोण आहे? असें असून
आपला प्रभु राजा ह्याचें तूं कां रक्षण केलें नाहीं?
एक जण तर तुझा स्वामी राजा याचा घात करण्यास
आला होता; १६ तूं जें हें काम केलें तें कांहीं चांगलें
नव्हे; परमेश्वराच्या जीविताची शपथ, तुम्ही मरण-
दंडास पात्र आहां, कारण प्रभु परमेश्वर याचा
अभिषिक्त आपला स्वामी ह्याचें रक्षण तुम्हीं
केलें नाहीं. राजाचा भाला व त्याच्या उशाजवळ

असलेला प्राण्याचा चंबू कोठें आहे तो पाहा. १७ तेव्हां
शौल दाविदाचा शब्द ओळखून म्हणाला, माझ्या
पुत्रा दाविदा, हा तुझाच शब्द काय? दावीद म्हणाला,
माझे स्वामी महाराज, होय, हा माझाच शब्द. १८ तो
आणखी म्हणाला, माझे स्वामी आपल्या दासाच्या
पाठीस कां लागले आहेत? मीं काय केलें आहे? माझ्या
हातून कोणती कसूर झाली आहे? १९ आतां माझे
स्वामी महाराज यांनीं आपल्या दासाची विनंति ऐकावी;
परमेश्वरानें जर आपणाला मजविरुद्ध चेतविलें असेल तर
तो हें माझें अर्पण मान्य करो; पण कोणीं मानवांनीं
आपणांला चेतविलें असेल तर परमेश्वराच्या दृष्टीनें ते
शापित होवोत, कारण मीं परमेश्वराच्या वतनाचा
वांटेकरी होऊं नये म्हणून त्यांनीं मला बाहेर हाकून
दिलें आहे. ते म्हणतात, जा, अन्य देवांची उपासना
कर. २० तर आतां परमेश्वराच्या दृष्टीवेगळें माझें
रक्त भूमीवर न पडो; डोंगरांत कोणी तित्तिराची
शिकार करावी तसा इस्राएलाचा राजा एक पिसू
धुंडावयास निघाला आहे. २१ तेव्हां शौल म्हणाला,
मी अपराधी आहें, माझ्या पुत्रा दाविदा, माघारीं ये;
आज माझा प्राण तुझ्या दृष्टीला मोलवान् वाटला
म्हणून यापुढें तुला मी कांहींएक उपद्रव करणार
नाहीं; पाहा, मी मूर्खपणानें वागलों आहें, माझ्या
हातून मोठा अधर्म झाला आहे. २२ दावीद म्हणाला,
महाराज, हा पाहा भाला; हा घेऊन जाण्यासाठीं एकाद्या
सेवकास पाठवा; २३ परमेश्वर प्रत्येकास त्याच्या
धार्मिकतेचें व सचोटीचें फळ देईल; आज परमेश्वरानें
आपणाला माझ्या हातीं दिलें होतें तरी मीं परमेश्वराच्या
अभिषिक्तावर आपला हात टाकिला नाहीं; २४ पाहा,
आपला प्राण जसा माझ्या दृष्टीला आज मोलवान् वाटला
तसाच माझाहि प्राण परमेश्वराच्या दृष्टीस मोलवान्
वाटो व तो मला सर्व संकटांतून सोडवो. २५ तेव्हां
शौल दाविदास म्हणाला, माझ्या पुत्रा, दाविदा, तूं
धन्य हो; तूं मोठा पराक्रमी होशील आणि खरोखर
यशस्वी होशील. मग दावीद आपल्या वाटेनें गेला
आणि शौल स्वस्थानीं परत आला.

२७ १ दावीद आपल्या मनांत म्हणाला, मी
कोणत्या तरी दिवशीं शौलाच्या हातून मरणारच;
तर पलिष्टयांच्या देशांत पळून जावें यापेक्षां
दुसरा चांगला उपाय नाहीं; अशानें शौल माझ्या-
संबंधानें निराश होऊन इस्राएल देशाच्या कोणत्याहि
प्रांतांत माझा यापुढें शोध करणार नाहीं; याप्रमाणें मी
त्याच्या हातून सुटून जाईन. २ तेव्हां दावीद आणि
त्याच्याबरोबरचे सहाशें लोक निघून गथचा राजा
मावोखपुत्र आखीश याजकडे गेले. ३ दावीद व त्याचे
लोक आपआपल्या परिवारांसह गथांत आखिशाच्या-
जवळ राहिले; दावीद आपल्या दोन स्त्रिया म्हणजे
इज्रेलीण अहीनवाम व नाबालाची स्त्री कर्मेलीण
अबीगईल यांस घेऊन राहिला. ४ दावीद गथ येथें
पळून गेला हें वर्तमान शौलास समजल्यावर त्यानें
त्याचा तदनंतर शोध केला नाहीं.

५ दावीद आखीशास म्हणाला, मजवर आपली कृपा-
दृष्टि असेल तर एकाद्या खेडेगांवांत मला जागा द्या
म्हणजे मी तेथें राहीन; आपल्या दासानें आपल्याबरोबर
राजधानींत कां राहावें? ६ तेव्हां आखीशानें त्या दिवशीं
त्याला सिक्लाग हें नगर दिलें; म्हणून सिक्लाग हें नगर
आजवर यहूदाच्या राजांचें आहे.

७ पलिष्टयांच्या देशांत दावीद जाऊन राहिल्यास
पुरें एक वर्ष चार महिने झाले. ८ मग दावीद व त्याचे
लोक यांनीं गशूरी, गिरजी व अमालेकी यांच्यावर स्वारी
केली; शूराकडून मिसर देशाकडे जातांना जो प्रदेश
लागतो त्यांत हीं राष्ट्रें प्राचीन काळापासून वसलीं
होतीं. ९ दाविदानें त्या प्रदेशावर मारा केला आणि
तेथल्या कोणाहि स्त्रीपुरुषांस जीवंत सोडिलें नाहीं,
आणि तेथलीं शेरडेंमेंढरें, गाईबैल, गाढवें, उंट आणि
वस्त्रप्रावरणें घेऊन तो परत आखीशाकडे गेला.
१० आखिशानें विचारिलें, आज तूं कोणावर स्वारी
केली? दावीद म्हणाला, यहूदाचा दक्षिण प्रांत, यर-
हमेल्यांचा दक्षिण प्रांत व केन्यांचा दक्षिण प्रांत यांवर.
११ दाविदानें गथ येथें आणावयास कोणीं स्त्री किंवा
पुरुष जीवंत ठेविला नाहीं; तो म्हणाला, त्यांना आणिलें

असतें तर दाविदानें असें असें केलें अशी त्यांनीं
आमची चहाडी केली असती. तो पलिष्ट्यांच्या देशांत
राहिला तोंपर्यंत त्याचा असाच क्रम चालू राहिला.
१२ आखीशानें दाविदाच्या बोलण्यावर भरंवसा ठेवून
म्हटलें, यानें इस्राएल लोकांस आपला अगदीं वीट
येईलसें केलें आहे; तर आतां हा निरंतर आपला दास
होऊन राहील.

१ त्या काळीं पलिष्ट्यांनीं इस्राएल लोकांशीं
२८ लढण्यास आपलीं सैन्यें एकवट केलीं. तेव्हां
आखीश दाविदास म्हणाला, हें पक्कें समज कीं
तुला आपल्या लोकांसह लढावयास माझ्या सैन्याबरोबर
यावें लागणार. २ दावीद आखीशास म्हणाला, आपला
दास काय करील तें आपणाला आतां समजून येईल.
आखीश दाविदास म्हणाला, म्हणूनच मी तुला माझें शिर
सलामत राखावयास कायमचा ठेवून घेतों.

३ शमुवेल मृत्यु पावला होता; सर्व इस्राएल
लोकांनीं त्याच्यासाठीं मोठा शोक करून त्याचें नगर
रामा येथें त्यास मूठमाती दिली होती. शौलानें दैवज्ञांस
व मांत्रिकांस देशांतून घालवून दिलें होतें. ४ पलिष्ट्यांनीं
एकवट होऊन शूनेम येथें छावणी दिली; इकडे
शौलानें सर्व इस्राएल जमा करून गिलबोवा येथें छावणी
दिली. ५ पलिष्ट्यांचें सैन्य पाहून शौल घाबरला व
त्याच्या मनाचा थरकांप झाला. ६ शौलानें परमेश्वरास
प्रश्न विचारिले असतां परमेश्वरानें स्वप्नें, उरीम अथवा
संदेष्टे अशा कोणाच्याहि द्वारें उत्तर दिलें नाहीं.
७ तेव्हां शौल आपल्या सेवकांस म्हणाला, एकादी भूत-
विद्याप्रवीण स्त्री शोधा, म्हणजे मी तिच्याकडे जाऊन
प्रश्न विचारीन. त्याचे चाकर त्यास म्हणाले, पाहा,
एन-दोर येथें एक भूतविद्याप्रवीण स्त्री राहत आहे.
८ मग शौलानें आपला वेश पालटून दुसरे कपडे
घातले आणि दोन माणसें बरोबर घेऊन तो रातोरात
त्या स्त्रीकडे गेला; तो तिला म्हणाला, प्रश्न पाहा;
आपल्या भूतविद्येचा प्रयोग करून ज्या कोणाचें मी नांव
घेईन त्यास उठवून मजकडे आण. ९ ती स्त्री त्यास
म्हणाली, शौलानें काय केलें तें तुला ठाऊकच आहे;
भूतविद्याप्रवीण व चेटकी यांचें त्यानें देशांतून उच्चाटन
केलें आहे; आतां मला मारून टाकावें म्हणून माझ्या
जिवाला पाश कां लावतोस? १० शौलानें परमे-
श्वराची शपथ घेऊन तिला म्हटलें, परमेश्वराच्या
जीविताची शपथ, या बाबतींत तुला कांहींएक दंड
व्हावयाचा नाहीं. ११ त्या स्त्रीनें विचारिलें, मी
तुझ्यासाठीं कोणाला उठवून आणूं? तो म्हणाला,
शमुवेलास उठवून आण. १२ त्या स्त्रीनें शमुवेलास
पाहिलें, तेव्हां मोठ्यानें किंकाळी फोडून ती शौलास
म्हणाली, आपण मला कां फसविलें? आपण शौल आहां.
१३ राजानें तिला म्हटलें, भिऊं नको; तुला काय
दिसतें? ती शौलास म्हणाली, कोणी दैवत पृथ्वींतून
वर येतांना दिसत आहे. १४ त्यानें तिला विचारिलें,
त्याचें स्वरूप कसें आहे? ती म्हणाली, एक वृद्ध पुरुष
उठून येत आहे; त्यानें झगा घातला आहे. तेव्हां
शौलानें ताडिलें कीं तो शमुवेल असावा; म्हणून त्यानें
भूमीपर्यंत लवून नमस्कार केला. १५ शमुवेल शौलास
म्हणाला, तूं मला वर बोलावून माझ्या शांतीचा भंग
कां केला? शौल म्हणाला, मी मोठ्या संकटांत पडलों
आहें; पलिष्टी मजशीं लढत आहेत, आणि देवानें
माझा त्याग केला आहे, आणि आतां मला तो
संदेष्ट्यांच्या अथवा स्वप्नांच्या द्वारें माझ्या प्रश्नाचें उत्तर
देत नाहीं; यास्तव मीं आतां काय करावें तें तूं मला
सांगावें म्हणून मीं तुला बोलाविलें आहे. १६ शमुवेल
म्हणाला, परमेश्वर तुझा त्याग करून तुझा शत्रु
झाला आहे, तर तूं मला कशाला प्रश्न करितोस?
१७ परमेश्वरानें माझ्या द्वारें सांगितलें होतें तसेंच
त्यानें आपल्या मनोदयाप्रमाणें केलें आहे; परमेश्वरानें
तुझ्या हातून राज्य हिसकावून घेऊन तुझा शेजारी
दावीद यास दिलें आहे. १८ तूं परमेश्वराची वाणी
ऐकली नाहीं व त्याच्या कोपानुसार तूं अमालेकास
शासन केलें नाहीं; म्हणून आज परमेश्वर तुजशीं असा
वागला आहे. १९ एवढेंच नव्हे तर परमेश्वर तुझ्या-
बरोबर इस्राएल लोकांसहि पलिष्ट्यांच्या हातीं देईल;
उद्यां तूं आपल्या पुत्रांसह मजकडे येशील; परमेश्वर

इस्राएलाचें सैन्य पलिष्ट्यांच्या हातीं देईल. २० मग
शौल भूमीवर सपशेल पालथा पडला; शमुवेलाच्या
भाषणानें तो अत्यंत भयभीत झाला; त्याच्यांत कांहीं
त्राण उरलें नाहीं. त्यानें दिवसभर व रात्रभर बिलकूल
अन्न सेवन केलें नव्हतें म्हणून त्याच्या अंगांत मुळींच
ताकद उरली नव्हती. २१ मग ती स्त्री शौलाकडे आली
व तो फार व्याकुळ झाला आहे असें पाहून त्याला
म्हणाली, पाहा, आपल्या दासीनें आपलें म्हणणें ऐकलें,
आणि आपला प्राण मुठींत धरून आपण मला सांगितलेले
शब्द मीं ऐकले; २२ तर आतां आपणहि आपल्या
दासीचें म्हणणें ऐका; मी आपणाला घासभर अन्न वाढितें
तें खा म्हणजे वाटेनें चालावयास आपणाला शक्ति येईल.
२३ तो म्हणाला, मला नको, मी खाणार नाहीं.
त्या स्त्रीप्रमाणें त्याच्या चाकरांनींहि त्याला आग्रह केला
तेव्हां त्यानें त्यांचें म्हणणें ऐकलें. तो जमिनीवरून
उठून पलंगावर बसला. २४ त्या स्त्रीच्या घरीं एक
लठ्ठ वासरूं होतें; तें तिनें त्वरेनें कापलें, आणि कांहीं
पीठ घेऊन तें तिनें मळिलें आणि बेखमीर भाकरी
भाजिल्या; २५ मग तिनें तें अन्न शौलापुढें व त्याच्या
चाकरांपुढें ठेविलें, आणि ते जेवले. नंतर ते त्या रात्रीं
निघून गेले.

१ इकडे पलिष्ट्यांनीं आपली सर्व सेना
२९ अफेकांत एकवट केली; इस्राएल लोकांनीं
इज्रेलांत एका झऱ्यापाशीं छावणी दिली होती.
२ पलिष्ट्यांचे सरदार आपआपल्या शंभरशंभर व हजार-
हजार योद्धयांच्या पुढें चालले, आणि सैन्याच्या
पिछाडीस आखीशाबरोबर दावीदहि आपल्या मनुष्यांच्या
पुढें चालला. ३ पलिष्ट्यांचे सरदार म्हणाले, या
इब्र्यांचें येथें काय काम ? तेव्हां आखीश पलिष्ट्यांच्या
सरदारांस म्हणाला, इस्राएलाचा राजा शौल याचा सेवक
दावीद हा नव्हे काय ? आज तो कैक दिवस किंबहुना
कैक वर्षें मजपाशीं आहे; तो त्यांना सोडून मजकडे
आला तेव्हांपासून आजपर्यंत मला त्याच्यांत कांहीं
वावगें आढळलें नाहीं; ४ पण पलिष्ट्यांचे सरदार
त्याजवर फार रागावले; ते त्यास म्हणाले, जें स्थल तूं
त्यास दिलें आहे तेथें त्याला परत पाठवून दे; त्यानें
आम्हांबरोबर लढाईस येऊं नये; तो आला तर तो
आमचा वैरी होईल; तो आपल्या स्वामीला दुसऱ्या
कशानें प्रसन्न करणार बरें ? या लोकांचीं शिरें
कापूनच कीं नाहीं ?

५ शौलानें हजारों वधिले,
दाविदानें लाखों वधिले,

असें ज्याविषयीं लोक नाचून व गाऊन आळीपाळीनें
म्हणाले तोच हा दावीद ना ? ६ तेव्हां आखीशानें
दाविदास बोलावून म्हटलें, परमेश्वराच्या जीविताची
शपथ, तूं तर सात्विकपणानें वर्तला आहेस आणि
सैन्यांत मला तुझी वर्तणूक चांगली दिसून आली
आहे; कारण जेव्हांपासून तूं मजकडे आलास तेव्हां-
पासून तुझ्या ठायीं मला कांहीं वाईट आढळून आलें
नाहीं; पण तूं सरदारांच्या मनास कांहीं येत नाहींस;
७ तर आतां तूं सुखरूप परत जा, पलिष्ट्यांच्या सर-
दारांची इतराजी करून घेऊं नको. ८ दावीद
आखीशास म्हणाला, मीं काय केलें आहे ? मी आपणाकडे
आलों तेव्हांपासून आजपर्यंत आपणाला आपल्या दासाच्या
ठायीं काय आढळलें आहे कीं आपला स्वामी
राजा याच्या शत्रूंशीं लढावयास जाऊं नये ? ९ आखीश
दाविदास म्हणाला, मला ठाऊक आहे कीं तूं माझ्या
दृष्टीनें देवदूतासारखा चांगला आहेस; तरी पलिष्ट्यांचे
सरदार म्हणतात कीं तूं त्यांच्याबरोबर लढाईस जाऊं
नये. १० तर आतां तुझ्या धन्याचे चाकर जे तुज-
बरोबर आले आहेत त्यांच्यासह पहाटेस उठ आणि
उजाडतांच मार्गस्थ हो. ११ दावीद व त्याचे लोक
पहाटेस उठून पलिष्ट्यांच्या देशीं परत गेले. इकडे
पलिष्टी इज्रेलावर चढाई करून गेले.

१ दावीद आपल्या मनुष्यांबरोबर सिक्लाग
३० येथें तिसऱ्या दिवशीं पोहंचला तेव्हां त्यांच्या
दृष्टीस पडलें कीं अमालेक्यांनीं दक्षिण देश व
सिक्लाग यांवर स्वारी केली असून सिक्लागावर मारा
करून तें अग्नीनें जाळून टाकिलें आहे, २ आणि तेथील
स्त्रियांस व लहानमोठ्या सगळ्यांस त्यांनीं कैद करून
नेलें आहे; त्यांनीं कोणाची कत्तल केली नाहीं, तर
त्यांचा पाडाव करून ते आपल्या वाटेनें गेले. ३ दावीद

व त्याचे लोक नगरांत आले तेव्हां नगर जाळून
टाकिलें आहे आणि त्यांच्या स्त्रिया, पुत्र व कन्या पाडाव
करून नेल्या आहेत असें त्यांस दिसून आलें. ४ तेव्हां
दावीद व त्याच्याबरोबरचे लोक हेल काढून एवढे
रडले कीं त्यांना आणखी रडण्याची शक्ति राहिली
नाहीं. ५ दाविदाच्या दोन्ही स्त्रिया इज्रेलीण अहीनवाम
व नाबालाची स्त्री कर्मेलीण अबीगईल यांना पाडाव
करून नेलें होतें. ६ त्या समयीं दावीद मोठ्या पेचांत
पडला; कारण लोक आपले पुत्र व कन्या यांच्या-
करितां शोकाकुल होऊन दाविदास दगडमार करावा
असें म्हणूं लागले; पण दावीद आपला देव परमेश्वर
याजवर भिस्त ठेवून खंबीर राहिला.

७ दावीद अहीमलेखाचा पुत्र अब्याथार याजक
यास म्हणाला, एफोद मजकडे आण. तेव्हां अब्या-
थारानें एफोद दाविदाकडे आणिलें. ८ दाविदानें
परमेश्वरास प्रश्न केला, मी या टोळीचा पाठलाग करूं
काय? मी त्यांस गांठीन काय? त्यानें उत्तर दिलें,
त्यांचा पाठलाग कर, तूं खात्रीनें त्यांस गांठिशील व
सर्वांना सोडवून आणिशील. ९ तेव्हां दावीद आपल्या-
बरोबरचीं सहाशें माणसें घेऊन बसोर नाल्यापर्यंत
जाऊन पोहंचला; तेथें कांहीं लोक मागें पडले व ते तेथें
राहिले. १० दावीद व चारशें लोक यांनीं पाठलाग
चालविला; बाकीचे दोनशें लोक एवढे थकून गेले
होते कीं त्यांस बसोर नाल्यापलीकडे जातां येईना.
११ त्यांच्या लोकांस मैदानांत एक मिसरी पुरुष आढ-
ळला; त्यास त्यांनीं दाविदाकडे नेलें; त्यांनीं भाकर दिली
ती त्यानें खाल्ली आणि त्यास त्यांनीं पाणी पाजिलें.
१२ आणखी त्यास अंजिराच्या ढेपेचा तुकडा व दोन
खिसमिसांचे घड दिले; ते खाऊन तो ताजातवाना
झाला, कारण तीन दिवस व तीन रात्री त्यानें भाकर
खाल्ली नव्हती कीं तो पाणी प्याला नव्हता. १३ दाविदानें
त्यास विचारिलें, तूं कोण, कोठला? त्यानें म्हटलें, मी
एक मिसरी तरुण पुरुष असून एका अमालेकी
मनुष्याचा दास आहें. आज तीन दिवस झाले, मी
आजारी पडलों म्हणून माझा धनी मला सोडून गेला.
१४ आम्हीं करेथ्यांच्या दक्षिण प्रांतावर, यहूदा प्रांतावर
व कालेबाच्या दक्षिण भागावर स्वारी केली आणि
सिक्लाग आग लावून जाळून टाकिलें. १५ दावीद त्यास
म्हणाला, त्या टोळीकडे मला नेशील काय? तेव्हां तो
म्हणाला, आपण मला जिवें मारणार नाहीं व माझ्या
धन्याच्या हातीं मला देणार नाहीं अशी आपण देवाच्या
नांवानें आणभाक कराल तर मी आपणाला त्या टोळीकडे
नेईन. १६ तो त्यास तेथें घेऊन गेला तेव्हां त्यास असें
दिसलें कीं लोक जमिनीवर चोहोंकडे पांगून खाऊन-
पिऊन मजा करीत आहेत; कारण त्यांनीं पलिष्ट्यांच्या
प्रांतांतून व यहूद्यांच्या प्रांतांतून पुष्कळ लूट आणिली
होती. १७ तेव्हां त्या दिवसाच्या संध्याकाळपासून
दुसऱ्या दिवसाच्या संध्याकाळपर्यंत दावीद त्यांचा
संहार करीत राहिला; त्यांच्यापैकीं चारशें तरुण पुरुष
उंटांवर स्वार होऊन पळून गेले होते त्यांखेरीज एकहि
मनुष्य बचावला नाहीं. १८ अमालेकी लोकांनीं पाडाव
करून नेलेल्या सर्वांस दाविदानें सोडविलें आणि आपल्या
दोन्ही स्त्रियाहि सोडविल्या. १९ लहानथोर, कन्यापुत्र,
लूट वगैरे जें कांहीं ते घेऊन गेले होते त्यांतलें त्यांस
परत मिळालें नाहीं असें कांहींच नव्हतें; दाविदानें
तें सर्व परत आणिलें. २० दाविदानें त्यांचीं शेरडें-
मेंढरें, गाढवें, बैल वगैरे सर्व लुटिलीं; हीं जनावरें लोक
आपल्या जनावरांपुढें हाकून नेतांना ते म्हणाले, ही
दाविदाची लूट आहे. २१ मग जे दोनशें पुरुष फार
थकल्यामुळें दाविदाबरोबर गेले नव्हते व ज्यांस बसोर
नाल्यापाशीं तो ठेवून गेला होता, त्यांच्याजवळ दावीद
गेला, तेव्हां ते त्यास व त्याच्याबरोबरच्या लोकांस
भेटावयास सामोरे आले; आणि दाविदानें त्यांच्याजवळ
जाऊन त्यांचें क्षेमकुशल विचारिलें. २२ तेव्हां
दाविदाबरोबर गेलेल्या लोकांपैकीं जे वाईट व अधम
लोक होते ते म्हणूं लागले, कांहीं लोक आमच्या-
बरोबर आले नाहींत म्हणून आम्हीं जी लूट
आणिली आहे तींतली त्यांस आम्ही कांहींएक देणार
नाहीं; प्रत्येकाचीं बायकापोरें मात्र ज्याचीं त्याला देऊं,
त्यांनीं त्यांस घेऊन निघून जावें. २३ पण दावीद

म्हणाला, बांधवहो, परमेश्वरानें जें आपणांला दिलें
आहे त्याचें असें करूं नका. त्यानें आपलें रक्षण केलें
आहे व जी टोळी आपल्यावर चाल करून आली होती
ती आपल्या हातांत दिली आहे. २४ या बाबतींत
तुमचें कोण ऐकणार ? जे लढाईस गेले त्यांस जेवढा
वांटा मिळेल तेवढाच जे सामानासुमानापाशीं राहिले
त्यांसहि मिळेल; त्यांस सारखाच वांटा मिळेल. २५ त्या
दिवसापासून पुढें हीच वहिवाट पडली; त्यानें असाच
नियमविधि इस्राएलांस आजपर्यंत लावून दिला आहे.

२६ दावीद सिक्लाग येथें आला तेव्हां त्यानें आपले
मित्र यहूदाचे वडील यांजकडे लुटीचा कांहीं भाग
पाठविला व त्यांस सांगून पाठविलें कीं परमेश्वराच्या
शत्रूंच्या लुटींतून तुम्हांस ही भेट पाठविली आहे;
२७ बेथेल, दक्षिणेंतील रामोथ, यत्तीर, २८ अरोएर,
सिफमोथ, एष्टमो, २९ राखाल व येरहमेली येथले
नगरवासी, केन्यांच्या नगरांतले रहिवासी, ३० हर्मा,
कोराशान, अथाख, ३१ आणि हेब्रोन आदिकरून ज्या
ज्या ठिकाणीं दावीद आपल्या लोकांसह फिरत असे
तेथील आपले मित्र यांस त्यानें लुटींतून भेटी पाठविल्या.

३१ १ पलिष्टी इस्राएलाशीं लढले; तेव्हां इस्रा-
एल लोक पलिष्ट्यांपुढून पळून गेले व गिलबोवा
डोंगरांत घायाळ होऊन पडले, २ पलिष्ट्यांनीं
शौलाचा व त्याच्या पुत्रांचा पाठलाग निकरानें करून
शौलाचे पुत्र योनाथान, अबीनादाब व मलकीशुवा
यांस वधिलें. ३ शौलाशीं फार निकराची लढाई झाली;
तिरंदाजांनीं त्यास गांठिलें; त्यांच्यामुळें तो फार हैराण
झाला. ४ तेव्हां शौल आपल्या शस्त्रवाहकास म्हणाला,
आपली तरवार उपसून मला भोसक, तसें न केल्यास
हे असुंती लोक येऊन मला भोसकतील व माझी
विटंबना करितील; पण त्याचा शस्त्रवाहक तसें करीना;
तो फार घाबरला होता. तेव्हां शौल आपली तरवार
काढून तिच्यावर पडला. ५ शौल मेला हें पाहून त्याचा
शस्त्रवाहकहि आपल्या तरवारीवर पडून त्याजबरोबर
मेला. ६ या प्रकारें शौल, त्याचे तिघे पुत्र, त्याचा शस्त्र-
वाहक व त्याचे सर्व लोक एकाच दिवशीं एकदम मृत्यु
पावले. ७ खोऱ्याच्या पलीकडे आणि यार्देनेच्या पलीकडे
जे इस्राएल लोक होते त्यांनीं पाहिलें कीं इस्राएल लोक
पळाले आहेत आणि शौल व त्याचे पुत्र मरण पावले
आहेत, तेव्हां तेहि आपआपलीं नगरें सोडून पळाले
आणि पलिष्टी लोक त्यांत जाऊन राहिले.

८ दुसऱ्या दिवशीं मारलेल्या लोकांना नागविण्यास
पलिष्टी आले तेव्हां शौल व त्याचे तिघे पुत्र गिलबोवा
डोंगरांत पडलेले त्यांस आढळले. ९ तेव्हां त्यांनीं
शौलाचें शिर छेदिलें, त्याचीं हत्यारें लुटिलीं आणि
आपल्या देशांत सर्वत्र जासूद पाठवून त्यांच्या देवळांत
व लोकांत हें वर्तमान पसरविलें. १० त्यांनीं त्याचीं
हत्यारें अष्टारोथ देवीच्या मंदिरांत ठेविलीं व त्याचें
धड बेथ-शानच्या गांवकुसास टांगिलें. ११ पलिष्ट्यांनीं
शौलाचें काय केलें तें याबेश-गिलादच्या रहिवाश्यांनीं
ऐकलें; १२ तेव्हां तेथले सर्व शूर वीर निघाले, आणि
रातोरात जाऊन त्यांनीं शौल व त्याचे पुत्र यांचीं प्रेतें
बेथ-शानाच्या गांवकुसावरून काढून याबेश येथें
आणिलीं व दहन केलीं. १३ त्यांनीं त्यांच्या अस्थि
याबेशांत चिंचेच्या झाडाखालीं नेऊन पुरिल्या आणि
सात दिवस उपास केला.

१ अ० १४:४९ येथें इश्वी.

# २ शमुवेल



१ शौलाच्या मृत्यूनंतर व दावीद अमालेक्यांचा
**१** संहार करून परत येऊन सिक्लाग येथें दोन दिवस
राहिल्यावर, २ तिसऱ्या दिवशीं छावणींतून शौल
होता तेथून एक माणूस आला; त्यानें आपले कपडे
फाडिले होते व डोक्यांत धूळ घातली होती. तो
दाविदापाशीं येऊन पोहंचल्यावर त्यानें त्यास साष्टांग
दंडवत घातलें. ३ दाविदानें त्याला विचारिलें, तूं कोठून
आलास? तो त्यास म्हणाला, मी इस्राएलाच्या
छावणींतून निभावून आलों आहें. ४ दाविदानें त्यास
विचारिलें, कसें काय वर्तमान आहे तें मला सांग
बरें. तो म्हणाला, लोक रणभूमीवरून पळाले, पुष्कळ
लोक पडले व प्राणांस मुकले; शाल व त्याचा पुत्र
योनाथान हेहि प्राणांस मुकले. ५ दाविदानें बातमी
आणणाऱ्या त्या तरुणास विचारिलें, शौल व
त्याचा पुत्र योनाथान हे मेले हें तुला कशावरून
कळलें? ६ तो बातमी आणणारा तरुण म्हणाला,
मी सहज गिलबोवाच्या डोंगरांत फिरत असतां शौल
आपल्या भाल्यावर टेकलेला आहे आणि रथ व स्वार
त्याच्या पाठीशीं येऊन अगदीं भिडले आहेत असें
मला दिसलें. ७ शौलानें मागें पाहिलें तों मी त्याला
दिसलों आणि त्यानें मला हाक मारिली. तेव्हां मी
म्हणालों, काय आज्ञा? ८ तो मला म्हणाला, तूं कोण
आहेस? मी त्यास म्हणालों, मी अमालेकी आहें. ९ तो
मला म्हणाला, माझ्याजवळ उभा राहून माझा वध
कर; मला यातना होत आहेत तरी माझा प्राण
अद्यापि कायमच आहे. १० तेव्हां मीं त्याच्यापाशीं
उभें राहून त्याला वधिलें, कारण त्याचें असें पतन
झाल्यावर तो वांचणार नाहीं अशी माझी खात्री
झाली होती. मीं त्याच्या मस्तकाचा मुकुट व त्याचीं
बाहुभूषणें काढून येथें माझ्या स्वामीजवळ आणिलीं
आहेत. ११ हें ऐकून दाविदानें आपलीं वस्त्रें धरून
फाडिलीं आणि जितके माणूस त्याजबरोबर होते त्यांनींहि
तसेंच केलें; १२ शौल, त्याचा पुत्र योनाथान, परमे-
श्वराचे लोक आणि इस्राएलाचें घराणें हीं तरवारीनें
पडलीं म्हणून त्यांच्याबद्दल त्यांनीं शोक केला, विलाप
केला आणि संध्याकाळपर्यंत ते उपाशीं राहिले.
१३ मग दाविदानें आपणास बातमी देणाऱ्या त्या
तरुण मनुष्यास विचारिलें, तूं कोठला? तो म्हणाला,
मी एका परदेश्याचा पुत्र आहें, मी अमालेकी आहें.
१४ दावीद त्यास म्हणाला, परमेश्वराच्या अभिषिक्ताचा
वध करण्यास हात चालविण्याची तुला भीति कशी
नाहीं वाटली? १५ दाविदानें एका तरुणास
बोलावून सांगितलें, जवळ जाऊन त्याजवर हल्ला कर.
त्यानें त्याजवर असा वार केला कीं तो मेलाच.
१६ दावीद त्यास म्हणाला, तुझा रक्तपात तुझ्याच
माथीं असो; परमेश्वराच्या अभिषिक्ताला मीं वधिलें असें
म्हटल्यानें तुझ्याच मुखानें तुजविरुद्ध साक्ष दिली आहे.

१७ मग दाविदानें शौल व त्याचा पुत्र योनाथान
यांच्यासंबंधानें पुढील विलापगीत गाइलें; १८ आणि
हें धनुष्यनामक गीत यहूद्यांस शिकविण्याची आज्ञा
केली; पाहा, हें गीत याशाराच्या पुस्तकांत
लिहिलेलें आहे :—

१९ हे इस्राएला, तुझा शिरोमणि उच्चस्थानीं वधिला
आहे.
बलाढ्य पाहा कसे पतन पावले आहेत!
२० गथांत हें सांगूं नका,
अष्कलोनच्या आळ्यांत हें जाहीर करूं नका;
पलिष्ट्यांच्या कन्या आनंदित होतील,
बेसुंत्यांच्या कन्या जयघोष करितील; असें न होवो.
२१ गिलबोवाच्या डोंगरांनो,

तुम्हांवर दहिंवर न पडो, पर्जन्यवृष्टि न होवो,
नजराणा म्हणून देण्यास तुम्हांवर अर्पणयोग्य शेतें
न होवोत;
कारण तेथें पराक्रम्यांची ढाल भ्रष्ट झाली आहे,
शौलाची ढाल तैलाभ्यंगावांचून भ्रष्ट होऊन
पडली आहे.
२२ वधिलेल्यांचें रक्त प्राशन केल्यावांचून व बलाढ्यांचें
मांदें भक्षण केल्यावांचून
योनाथानाचें धनुष्य कधीं परत येत नसे,
शौलाची तरवार कधीं रिकामी परतत नसे.
२३ शौल व योनाथान प्रेमळ व मनमिळाऊ असत;
जीवनांत व मरणांत त्यांचा वियोग झाला नाहीं;
ते गरुडांहून वेगवान् व सिंहांहून बलवान् होते.
२४ इस्राएली कन्यांनो, शौलासाठीं रुदन करा;
तो तुम्हांस किरमिजी वस्त्रें लेववून शृंगारीत असे;
तो तुमच्या वस्त्रांवर सोन्याचे अलंकार घालीत
असे.
२५ रणभूमीवर बलाढ्य पाहा कसे पतन पावले आहेत?
योनाथाना, तूं उच्चस्थानीं वधिला गेला आहेस!
२६ माझ्या बंधो, योनाथाना, मी तुझ्याकरितां विव्हळ
होत आहें;
तूं मजवर फार माया करीत असस; तुझें मजवर
विलक्षण प्रेम होतें,
स्त्रियांच्या प्रेमाहूनहि तें अधिक होतें.
२७ बलाढ्य पाहा कसे पतन पावले आहेत!
युद्धाचीं शस्त्रें कशीं नाश पावलीं आहेत!

२ १ यानंतर दाविदानें परमेश्वरास प्रश्न विचारिला
कीं मी यहूदाच्या एकाद्या नगरांत जाऊं काय?
परमेश्वरानें म्हटलें, जा. दाविदानें विचारिलें, कोणी-
कडे जाऊं? त्यानें म्हटलें, हेब्रोनास जा. २ मग दावीद
इज्रेलीण अहीनवाम आणि नाबालाची स्त्री कर्मेलीण
अबीगईल या आपल्या दोघी स्त्रियांसह तेथें गेला.
३ त्याप्रमाणेंच दाविदाबरोबर जे पुरुष होते
त्या सर्वांस आपआपल्या कुटुंबांसह त्यानें बरोबर
नेलें, व ते हेब्रोनाच्या गांवांत जाऊन राहिले.
४ यहूदी लोकांनीं तेथें जाऊन दाविदास अभिषेक
करून यहूदाच्या वंशाचा राजा नेमिलें.

दाविदास असें कळून आलें कीं शौलास ज्यांनीं
मूठमाती दिली ते याबेश-गिलादचे लोक होते.
५ तेव्हां दाविदानें याबेश-गिलादच्या लोकांकडे
जासूद पाठवून त्यांस सांगितलें कीं तुम्हीं आपला
स्वामी शौल यास मूठमाती दिली ही तुम्हीं त्याजवर
दया केली, याबद्दल परमेश्वर तुमचें कल्याण करो.
६ आतां परमेश्वर तुम्हांशीं दयेनें व सत्यतेनें वर्तो;
तुम्हीं हें कृत्य केलें आहे या तुमच्या चांगुलपणाचा
मोबदला मीहि तुम्हांस देईन. ७ हिंमत धरा, शूर
व्हा; तुमचा स्वामी शौल मृत्यु पावला आहे आणि
यहूदाच्या घराण्यानें मला अभिषेक करून आपल्यावर
राजा नेमिलें आहे.

८ इकडे नेराचा पुत्र अबनेर जो शौलाचा सेनापति
होता तो शौलाचा पुत्र ईश-बोशेथ यास बरोबर घेऊन
नदीपलीकडे महनाइम येथें गेला; ९ आणि त्यानें गिलाद,
अश्शुऱ्यांचा देश, इज्रेल, एफ्राईम, बन्यामीन वगैरे
एकंदर इस्राएलांवर त्यास राजा नेमिलें. १० शौलाचा
पुत्र ईश-बोशेथ इस्राएलांवर राज्य करूं लागला तेव्हां
तो चाळीस वर्षांचा होता; त्यानें दोन वर्षें राज्य
केलें; पण यहूदाचें घराणें दाविदास धरून राहिलें.
११ हेब्रोनांत दाविदानें यहूदाच्या घराण्यावर राज्य
केलें त्याची मुदत साडेसात वर्षांची होती.

१२ मग नेराचा पुत्र अबनेर आणि शौलाचा पुत्र
ईश-बोशेथ यांचे सेवक महनाइमाहून गिबोन येथें गेले.
१३ इकडे सरूवेचा पुत्र यवाब व दाविदाचे सेवक हे
बाहेर पडले आणि त्या उभय सैन्यांची गिबोनाच्या
तळावापाशीं गांठ पडली; तेथें एक सैन्य तळावाच्या
एका बाजूला व दुसरें दुसऱ्या बाजूला उतरलें.
१४ तेव्हां अबनेर यवाबास म्हणाला, तरुण पुरुषांनीं
उठून आपल्यापुढें दोन हात खेळावे; यवाबानें म्हटलें,
बरें, त्यांनीं उठावें. १५ शौलाचा पुत्र ईश-बोशेथ याचे
बारा तरुण बन्यामिनी आणि दाविदाच्या लोकांतले
बारा असे संख्येनें सारखे पुरुष उठून पुढें सरसावले.

१६ तेव्हां त्या सर्वांनीं एकमेकांचीं मस्तकें धरून
आपल्या तरवारी आपल्याबरोबर झुंजणाऱ्यांच्या
कुशींत खुपसल्या व ते सर्व एकदम पडले; यावरून
त्या स्थलाचें नांव हेलकथ-हसूरीम (तीक्ष्ण धारेच्या
सुऱ्यांचें क्षेत्र) असें पडलें; हें गिबोनांत आहे.
१७ त्या दिवशीं तुंबळ युद्ध झालें; दाविदाच्या सेवकां-
पुढें अबनेर व इस्राएल लोक यांनीं हार खाल्ली.
१८ सरूवेचे तिघे पुत्र यवाब, अबीशय व असाएल
तेथें होते; त्यांतला असाएल हा हरिणासारखा
पायांचा चपळ होता. १९ असाएलानें अबनेराचा
पाठलाग केला; तो त्याच्या पाठीस लागला असतां
उजवीडावीकडे वळला नाहीं. २० अबनेरानें माग
वळून त्याजकडे पाहिलें व विचारिलें, तूं असाएल
काय? तो म्हणाला, होय, तोच मी. २१ अबनेर
त्यास म्हणाला, उजवीकडे किंवा डावीकडे वळून
एकाद्या तरुणास पकडून त्याचें कवच लुटून घे; पण
असाएल त्याचा पाठलाग करावयाचें सोडीना. २२ अब-
नेर पुनः असाएलास म्हणाला, माझा पाठलाग करण्याचें
सोडून दे; तुला मारून जमिनीवर पाडण्यास मला कां
लावितोस? मग तुझा भाऊ यवाब यास मी आपलें
तोंड कसें दाखवूं? २३ तरी तो कांहीं केल्या मागें
सरेना; तेव्हां अबनेरानें आपल्या भाल्याचा दांडा
त्याच्या पोटांत असा खुपसला कीं तो त्याच्या पोटांत
जाऊन पाठींतून निघाला; आणि तो तेथेंच पडून
मेला. असाएल मरून पडला त्या ठिकाणीं जेवढे लोक
आले तेवढे स्तब्ध उभे राहिले. २४ इकडे यवाब व
अबीशय यांनीं अबनेराचा पाठलाग चालू ठेविला, व
सूर्यास्त होतां होतां अम्मा नामक पहाडापाशीं ते
पोहंचले; हा पहाड गिबोन रानाच्या वाटेवरील गिहा
नांवाच्या गांवासमोर आहे. २५ बन्यामिनी लोक
अबनेरापाशीं एकवट होऊन एक फौज बनून एका
पहाडाच्या शिखरावर उभे राहिले. २६ तेव्हां अबनेर
यवाबास हाक मारून म्हणाला, तरवारीस निरंतर
भक्ष्य देत राहावयाचें काय? याचा अंतीं परिणाम
दुःखदायक होणार हें तुला ठाऊक नाहीं काय?
आपल्या भाऊबंदांच्या पाठीस लागण्याचें सोडून द्या,
अशी आज्ञा तूं आपल्या लोकांस कोठवर करणार
नाहींस? २७ यवाब म्हणाला, देवाच्या जीविताची
शपथ, तूं बोलला नसतास तर खात्रीनें लोक सकाळीं
निघून गेले असते व ते आपल्या बांधवांच्या पाठीस
लागले नसते. २८ मग यवाबानें रणशिंग फुंकिलें तेव्हां
सर्व लोक थांबले व त्यानंतर त्यांनीं इस्राएलांचा
पाठलाग केला नाहीं किंवा त्यांच्याशीं लढाई केली नाहीं.
२९ अबनेर व त्याचे लोक रातोरात अराबामधून कूच
करून यार्देनेपलीकडे गेले, आणि सगळा बिथ्रोन प्रदेश
पायांखालीं घालून महनाइमास पोहंचले. ३० अबनेराचा
पाठलाग करण्याचें सोडून परत आल्यावर यवाबानें
सर्व लोक जमा केले, तेव्हां दाविदाच्या लोकांपैकीं
एकोणीस पुरुष व असाएल हे नाहींत असें त्यास
आढळून आलें; ३१ तेव्हां दाविदाच्या लोकांनीं
बन्यामिनी व अबनेराचे लोक यांस असा मार दिला
कीं त्यांतले तीनशें साठ पुरुष गतप्राण झाले; ३२ आणि
त्यांनीं असाएलास उचलून नेऊन बेथलहेमांतील
त्याच्या बापाच्या थडग्यांत मूठमाती दिली. मग
यवाब व त्याचे लोक रात्रभर कूच करून उजाडतां
हेब्रोनास पोहंचले.

३
१ शौलाचें घराणें व दाविदाचें घराणें यांच्या-
मध्यें फार दिवस युद्ध चालू राहिलें; दावीद प्रबल
होत गेला व शौलाचें घराणें निर्बल होत गेलें.

२ हेब्रोन येथें दाविदास पुत्र झाले ते हे: इज्रेलीण
अहीनवाम हिच्यापासून त्यास अम्नोन झाला; हा त्याचा
ज्येष्ठ पुत्र; ३ कर्मेली नाबालाची स्त्री अबीगईल हिच्या-
पासून त्यास किलाब झाला, हा त्याचा दुसरा पुत्र;
गशूरचा राजा तलमय याची कन्या माका हिच्यापासून
त्याला तिसरा पुत्र अबशालोम झाला; ४ हग्गीथीपासून
चौथा पुत्र अदोनीया झाला; अबीटलेपासून पांचवा
पुत्र शफाट्या झाला; ५ आणि दावीदाची स्त्री एग्ला
हिच्यापासून सहावा पुत्र इथ्राम झाला. हेब्रोन येथें
दाविदास जें पुत्र झाले ते हे.

६ शौलाचें घराणें व दाविदाचें घराणें यांमध्यें

जो कलह माजला होता त्यांत शौलाच्या घराण्यास
अबनेराचें पाठबळ होतें. ७ शौलाची एक उपपत्नी
होती; ती अय्याची कन्या असून तिचें नांव रिस्पा
असें होतें; ईश-बोशेथानें अबनेरास विचारिलें, तूं
माझ्या बापाच्या उपपत्नीपाशीं कां गेलास? ८ ईश-
बोशेथाचे हे शब्द ऐकून अबनेरास क्रोध आला व तो
त्यास म्हणाला, मी काय कुत्र्याचें डोकें आहें? मीं
काय यहूदाच्या पक्षाचा आहें? आज तुझा बाप
शौल याचें घराणें आणि आप्तजन यांजवर मीं दया
करीत असून तुला दाविदाच्या हातीं लागूं दिलें नाहीं,
आणि तूं आज ह्या बायकोच्या संबंधानें मला दोष
देत आहेस काय? ९-१० मीं शौलाच्या घराण्याकडून
राज्य हिसकावून घेईन आणि दाविदाची गादी दाना-
पासून बैर-शेब्यापर्यंत इस्राएल व यहूदा यांजवर
स्थापीन अशी आणभाक परमेश्वरानें केली आहे;
तदनुसार मीं त्याशीं वर्तन केलें नाहीं तर देव अब-
नेराचें त्या मानानें, किंबहुना त्याहूनहि अधिक शासन
करो. ११ त्याच्यानें अबनेरास कांहींएक जबाब
देववला नाहीं, कारण त्याचा त्याला धाक होता.

१२ अबनेरानें आपल्या नांवानें दाविदाकडे जासूद
पाठवून सांगितलें, हा देश कोणाचा बरें? आणखी असेंहि
सांगितलें कीं आपण माझ्याशीं सलोखा करा; सर्व इस्रा-
एलांचें मन आपणाकडे वळविण्याच्या कामीं मी आपणाला
हात देतों. १३ दाविदानें म्हटलें, बरें, मी तुजशीं सलोखा
करितों; पण एक गोष्ट तुला केली पाहिजे, ती ही कीं
तूं मला भेटावयास येशील तेव्हां आपल्याबरोबर
शौलाची कन्या मीखल हिला घेऊन येणार नाहींस तर
तुझी माझी भेट व्हावयाची नाहीं. १४ दाविदानें
शौलाचा पुत्र ईश-बोशेथ याजकडे जासूद पाठवून
सांगितलें कीं माझी स्त्री मीखल जी मीं शंभर पलिष्ट्यां-
च्या अग्रत्वचा देऊन घेतली तिला मजकडे पाठवून
दे. १५ ईश-बोशेथानें लोक पाठवून तिचा नवरा
लईशाचा पुत्र पालटीयेल त्याच्यापासून तिला आणिलें.
१६ तिचा नवरा तिच्याबरोबर गेला; तो बहूरीमा-
पर्यंत तिच्यामागून रडत गेला. तेव्हां अबनेर
त्यास म्हणाला, परत जा; मग तो माघारा गेला.

१७ मग अबनेरानें इस्राएलांच्या वडील जनांशीं
बोलणें लाविलें कीं दाविदानें आपल्यावर राज्य करावें
अशी तुमची गतकाळीं इच्छा होती, १८ तर आतां
ती पूर्ण करा; कारण परमेश्वरानें दाविदाविषयीं म्हटलें
आहे कीं माझा सेवक दावीद याच्याद्वारें मी आपले
लोक इस्राएल यांस पलिष्ट्यांच्या व त्यांच्या सर्व
शत्रूंच्या हातांतून सोडवीन. १९ मग अबनेरानें
बन्यामिनी लोकांशीं कानगोष्ट केली; आणि इस्राएलास
बन्यामिनी लोकांच्या सर्व घराण्यास जें कांहीं इष्ट वाटलें
तें दाविदाच्या कानावर घालण्यास तो हेब्रोनास देखील
गेला. २० अबनेर वीस पुरुष बरोबर घेऊन हेब्रोनास
दाविदाकडे आला. तेव्हां दाविदानें अबनेरास व
त्याच्याबरोबरच्या लोकांस मेजवानी दिली. २१ अब-
नेर दाविदास म्हणाला, मी आतां जातों आणि सर्व
इस्राएल लोकांस माझ्या स्वामीमहाराजापाशीं जमा
करितों, म्हणजे ते आपणाशीं करार करितील; मग
ज्यांवर राज्य करावें अशी आपली इच्छा आहे त्या सर्वांवर
आपण राज्य कराल. दाविदानें अबनेराची रवानगी केली,
व तो सुखरूप निघून गेला. २२ इकडे दाविदाचे
लोक यवाबाबरोबर लुटीच्या स्वारीवरून परत आले;
त्यांनीं मोठी लूट आणिली; त्या समयीं अबनेर दाविदा-
जवळ हेब्रोन येथें नव्हता; कारण त्यानें त्यास निरोप
दिला असून तो सुखरूप निघून गेला होता. २३ यवाब
व त्याच्याबरोबरचें सगळें सैन्य परत आलें तेव्हां
यवाबास लोकांनीं सांगितलें कीं नेराचा पुत्र अबनेर
राजाकडे आला होता; त्याची त्यानें रवानगी केली व
तो सुखरूप निघून गेला आहे. २४ यवाब राजाजवळ
जाऊन म्हणाला, आपण हें काय केलें? अबनेर आपणाजवळ
आला होता त्याची आपण कां रवानगी केली? तो हातचा
पार निघून गेला. २५ नेराचा पुत्र अबनेर यास
आपण ओळखीत असालच; तो आपणास फसवावयास आणि
आपली हालचाल व आपलें एकंदर करणेंसवरणें यांचा भेद
घेण्यास आला होता. २६ यवाब दाविदापासून
निघून गेल्यावर त्यास नकळत यवाबानें अबनेराकडे

जासूद पाठविले; आणि त्यांनीं त्यास सिरा नांवाच्या
विहिरीपासून परत आणिलें. २७ अबनेर हेब्रोनास
परत आला तेव्हां त्याशीं एकांतीं बोलण्यासाठीं म्हणून
यवाब त्यास वेशीच्या आंत घेऊन गेला; तेथें आपला
भाऊ असाएल याच्या रक्तपाताचा सूड उगविण्यासाठीं
त्यानें अबनेराच्या पोटावर असा वार केला कीं तो
प्राणास मुकला. २८ पुढें दाविदाच्या कानावर ही गोष्ट
गेली तेव्हां तो म्हणाला, नेराचा पुत्र अबनेर याच्या
खुनासंबंधानें मी व माझें राज्य परमेश्वराच्या दृष्टीनें
सदा निर्दोषच असणार. २९ तो दोष यवाबाच्या व
त्याच्या सगळ्या पितृकुळाच्या माथीं येवो; आणि
यवाबाच्या वंशांत स्रावी, महारोगी, काठी टेकीत
चालणारा, तरवारीनें पडणारा किंवा अन्नान्न करणारा
असा कोणी ना कोणी असल्यावांचून राहणार नाहीं.
३० यवाब व त्याचा भाऊ अबीशय ह्यांनीं अबनेराचा
वध केला; कारण त्यानें त्यांचा भाऊ असाएल ह्यास
गिबोनाच्या लढाईत मारिलें होतें.

३१ मग दावीद यवाबास व आपल्याबरोबरच्या
सर्व लोकांस म्हणाला, आपलीं वस्त्रें फाडा आणि गोण-
ताट नेसून अबनेरापुढें शोक करीत चाला. दावीद
राजा स्वतः त्याच्या तिरडीमागें चालला. ३२ त्यांनीं
हेब्रोन येथें अबनेरास मूठमाती दिली; अबनेराच्या
कबरेपाशीं राजा हेल काढून रडला; सर्व लोकहि
रडले. ३३ दाविदानें अबनेरासाठीं विलाप करून
हें गीत म्हटलें:

मूढाप्रमाणें अबनेरास मृत्यु प्राप्त व्हावा काय ?
३४ तुझे हस्त बद्ध केले नव्हते,
तुझ्या पायांत बेड्या घातल्या नव्हत्या;
अधर्म्यांपुढें जसा कोणी पतन पावतो
तसा तूं पतन पावलास.

हें ऐकून सर्व लोक त्याच्यासाठीं पुनः रडूं लागले.
३५ दिवस अजून थोडा उरला होता, तेव्हां सर्व लोक
दाविदानें अन्न खावें म्हणून त्यास आग्रह करण्यास
आले; पण दावीद शपथ घेऊन म्हणाला, सूर्यास्तापूर्वी
मीं जर भाकर किंवा कांहीं खाल्लें तर देव मला तसेंच,
किंबहुना त्याहूनहि अधिक शासन करो. ३६ सर्व
लोकांच्या हें लक्षांत आलें व त्यांस पसंत वाटलें;
राजा जें जें करी तें तें सर्व लोकांच्या मनास येई.
३७ यावरून सर्व लोकांच्या व सर्व इस्राएल लोकांच्या
लक्षांत आलें कीं नेराचा पुत्र अबनेर याचा वध
राजाकडून झाला नाहीं. ३८ राजा आपल्या सेवकांस
म्हणाला, आज इस्राएलांतला एक सरदार, एक मोठा
पुरुष पडला, हें तुम्हांला कळत नाहीं काय? ३९ मी
एवढा अभिषिक्त राजा आहें तरी आज निर्बल आहें व
हे सरूवेचे पुत्र मला फार भारी आहेत; पण परमेश्वर
दुष्कर्म करणाऱ्यांस त्यांच्या दुष्कर्मानुसार पारिपत्य करो.

४ १ अबनेर हेब्रोन येथें मारला गेला हें
शौलाच्या पुत्रानें ऐकलें तेव्हां त्याचे हात दुर्बळ
झाले व सर्व इस्राएल लोक घाबरे झाले.
२ शौलाच्या पुत्राजवळ दोघे पुरुष सेनानायक होते;
एकाचें नांव बाना व दुसऱ्याचें नांव रेखाब; हे
बन्यामिनी वंशांतला रिम्मोन बैरोथकर याचे पुत्र. बैरोथ
हें नगरहि बन्यामिन्याच्या प्रांतांत मोडत आहे.
३ बैरोथकर गित्तइमास पळून गेले व आजपर्यंत तेथें
उपरी म्हणून राहिले आहेत.

४ शौलाचा पुत्र योनाथान याचा एक पुत्र होता, तो
पायानें लंगडा होता. इज्रेल येथून शौल व योनाथान
यांच्याविषयींचें वर्तमान आलें तेव्हां तो पांच वर्षांचा
होता; त्या वेळीं त्याची दाई त्याला घेऊन पळाली;
ती घाईनें पळत असतां तो खालीं पडून लंगडा
झाला; त्याचें नांव मफीबोशेथ असें होतें.

५ दुपारीं उनाच्या वेळीं ईश-बोशेथ आराम करीत
असतां रिम्मोन बैरोथकर याचे पुत्र रेखाब व बाना
हे त्याच्या घरांत घुसले. ६ गहूं आणण्याच्या मिषानें
घरांत शिरून त्यांनीं त्याच्या पोटावर वार केला; मग
रेखाब व त्याचा भाऊ बाना हे निसटून गेले. ७ ते
घरांत शिरले तेव्हां तो आपल्या शय्यागृहांत पलंगावर
निजला होता; तेथें त्यांनीं त्याजवर प्रहार करून त्याचा
वध केला व त्याचें शिर कापून घेऊन ते रातोरात
अराबाच्या वाटेनें गेले. ८ त्यांनीं ईश-बोशेथाचें शिर

हेब्रोनांत दाविदाकडे आणिलें; ते राजास म्हणाले, पाहा, आपला शत्रु व आपला प्राण घेऊं पाहणारा शौलाचा पुत्र ईश-बोशेथ याचें हें शिर आहे; आज परमेश्वरानें माझ्या स्वामीमहाराजाप्रीत्यर्थ शौल व त्याचा वंश यांचा सूड उगविला आहे. ९ दाविदानें बैरोथकर रिम्मोन याचे पुत्र रेखाब व त्याचा भाऊ बाना यांस उत्तर दिलें कीं ज्या परमेश्वरानें सर्व संकटांतून माझा जीव वांचविला त्याच्या जीविताची शपथ, १० आपण चांगलें वर्तमान आणिलें आहे अशा समजुतीनें एकानें मला शौलाच्या मरणाची बातमी दिली; तेव्हां मीं सिक्लाग येथें त्यास धरून वधिलें; बातमी आणिल्याचें हें बक्षीस मीं त्यास दिलें. ११ तर आतां दुष्ट मनुष्यांनीं एका निर्दोष मनुष्याचा त्याच्या घरांत त्याच्या पलंगावर वध केला आहे; त्याच्या खुनाचा मोबदला घेण्यासाठीं तुम्हांस या भूतलावरून नष्ट करावें हें किती तरी विशेष आवश्यक आहे; नाहीं काय ? १२ दाविदानें आपल्या तरुण लोकांस आज्ञा केल्यावरून त्यांनीं त्यांचा वध केला आणि त्यांचे हातपाय तोडून त्यांस हेब्रोनाच्या तळ्यापाशीं टांगिलें. ईश-बोशेथाचें शिर नेऊन हेब्रोनांत अबनेराच्या कबरेंत पुरिलें.

५ १ मग इस्राएलाचे सर्व वंश हेब्रोनांत दाविदाकडे येऊन म्हणाले, पाहा, आम्ही तुमच्या हाडामांसाचे आहों. २ गतकालीं शौल आम्हांवर राजा असतां इस्राएल लोकांची नेआण करणारे पुढारी आपणच होतां, आणि परमेश्वर आपणाला म्हणाला होता कीं माझी प्रजा इस्राएल हिचा मेंढपाळ व अधिपति तूंच होशील. ३ या प्रकारें इस्राएलाचे सर्व वडील जन हेब्रोनांत राजाकडे आले, आणि दावीद राजानें त्यांच्याशीं हेब्रोनांत परमेश्वरासमोर करार केला, आणि त्यांनीं दाविदाला अभिषेक करून इस्राएलावर राजा नेमिलें.

४ दावीद राज्य करूं लागला तेव्हां तो तीस वर्षांचा होता; त्यानें चाळीस वर्षें राज्य केलें. ५ साडेसात वर्षें त्यानें हेब्रोनांत यहूदावर राज्य केलें आणि तेहतीस वर्षें यरुशलेमांत सर्व इस्राएल व यहूदा यांच्यावर राज्य केलें. ६ राजानें आपले लोक बरोबर घेऊन यरुशलेम येथें त्या देशचे रहिवासी यबूसी यांच्यावर स्वारी केली. ते म्हणाले, तुला येथें येणें साधावयाचें नाहीं; येथले अंधळेपांगळे तुला हाकून लावितील; त्यांचा भावार्थ असा होता कीं दाविदाला येथें येणें साधावयाचें नाहीं. ७ तरी दाविदानें सीयोन गड घेतला; हेंच तें दावीदपूर. ८ त्या दिवशीं दावीद म्हणाला, जो कोणी यबूस्यांस मारील त्यानें नळाजवळून जाऊन दाविदाच्या जिवाचा द्वेष करणाऱ्या त्या लंगड्या व अंधळ्या लोकांचा संहार करावा; यावरून अशी म्हण पडली आहे कीं येथें अंधळे व लंगडे आहेत, घरांत कोणाचा प्रवेश व्हावयाचा नाहीं. ९ दावीद त्या गडावर राहूं लागला; त्यास दावीदपूर हें नांव पडलें. दाविदानें मिल्लो बुरुजापासून आंतल्या बाजूस सभोवार तटबंदी केली. १० दाविदाचा उत्तरोत्तर उत्कर्ष होत गेला, कारण सेनाधीश देव परमेश्वर त्याच्याबरोबर असे.

११ सोरेचा राजा हीराम यानें दाविदाकडे जासूद पाठविले; त्यानें आणखी गंधसरूचें लाकूड, सुतार व गवंडी पाठविले; त्यांनीं दाविदासाठीं मंदिर बांधिलें. १२ परमेश्वरानें इस्राएलावरील आपलें राज्य स्थिर केलें आहे आणि आपल्या इस्राएली प्रजेप्रीत्यर्थ आपल्या राज्याची उन्नति केली आहे हें दाविदाच्या ध्यानांत आलें.

१३ मग दावीद हेब्रोनाहून आला तेव्हां त्यानें यरुशलेमांतून आणखी उपपत्नी व पत्नी आणखी केल्या; दाविदास आणखी पुत्र व कन्या झाल्या. १४ यरुशलेमांत त्यास पुत्र झाले त्यांचीं नांवें हीं: शम्मुवा, शोबाब, नाथान, शलमोन, १५ इभार, अलीशवा, नेफेग, याफीय, १६ अलीशामा, एल्यादा व अलीफलेट.

१७ दाविदाला अभिषेक करून इस्राएलाचा राजा केलें आहे हें ऐकून सर्व पलिष्टी दाविदाच्या शोधास निघाले; हें कानीं येतांच दावीद खालीं आपल्या गढींत गेला. १८ पलिष्टी येऊन रेफाईम खोऱ्यांत पसरले.

१९ दाविदानें परमेश्वरास प्रश्न केला, मी पलिष्ट्यांवर
चढाई करूं काय? तूं त्यांस माझ्या हातीं देशील काय?
परमेश्वरानें दाविदास म्हटलें, चढाई कर; मी खात्रीनें
पलिष्ट्यांस तुझ्या हातीं देतों. २० मग दावीद बाल-परा-
सीम येथें आला; तेथें दाविदानें त्यांचा संहार केला; तो
म्हणाला, परमेश्वर माझ्यापुढें चालून पाण्याच्या
लोंढ्याप्रमाणें माझ्या शत्रूंवर तुटून पडला; यावरून
त्या ठिकाणाचें नांव बाल-परासीम (तुटून पडण्याचें
ठिकाण) असें पडलें. २१ पलिष्टी तेथें आपल्या मूर्ति
टाकून गेले; त्या दाविदानें व त्याच्या लोकांनीं नेल्या.
२२ मग पुनरपि पलिष्टी चढाई करून येऊन
रेफाईम खोऱ्यांत पसरले. २३ मग दाविदानें
परमेश्वरास प्रश्न केला असतां त्यानें सांगितलें, त्यांजशीं
सामना करूं नको; तर वळसा घेऊन त्यांच्या पिछाडीस
जा आणि तुतीच्या झाडांसमोरून त्यांच्यावर छापा घाल.
२४ तुतीच्या झाडांच्या शेंड्यांमधून सेना कूच करीत
आहे असा आवाज तुझ्या कानीं पडतांच उठावणी
कर, कारण परमेश्वर पलिष्ट्यांच्या सेनेचा संहार
करण्यासाठीं तुझ्यापुढें गेला आहे असें समज.
२५ परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें दाविदानें केलें आणि
गेबापासून गेजेरापर्यंत तो पलिष्ट्यांस मार देत गेला.

६ १ नंतर दाविदानें पुनः एकदा इस्राएलांतले
तीस हजार निवडक पुरुष जमा केले. २ यहूदांतील
बाला येथून देवाचा कोश आणावा म्हणून दावीद
आपल्याजवळच्या सगळ्या लोकांस घेऊन गेला; करूबा-
रूढ असलेला सेनाधीश परमेश्वर याच्या नामाचा हा कोश.
३ त्यांनीं देवाचा कोश एका नव्या गाडींत ठेवून टेकडी-
वरील अबीनादाबाच्या घरांतून बाहेर काढिला; अबीना-
दाबाचे पुत्र उज्जा व अह्यो हे दोघे ती नवी गाडी हाकीत
होते. ४ त्यांनीं देवाच्या कोशासहित ती गाडी टेकडी-
वरील अबीनादाबाच्या घरांतून बाहेर काढिली; अह्यो हा
कोशापुढें चालत होता. ५ दावीद व इस्राएल घराण्याचे
सर्व लोक देवदारूच्या लाकडाचीं नानाविध वाद्यें आणि
वीणा, सारंगी, डफ, डमरू व झांजा परमेश्वरापुढें
वाजवीत चालले. ६ नाखोनाच्या खळ्यापाशीं ते आले
तेव्हां बैलानें ठोकर खाल्ली म्हणून उज्जानें देवाचा कोश
हात लांब करून धरिला. ७ तेव्हां परमेश्वराचा कोप
उज्जावर भडकला; त्याच्या ह्या चुकीमुळें परमेश्वरानें त्यास
ताडन केलें व तो तेथल्या तेथें देवाच्या कोशापाशीं
गतप्राण झाला. ८ परमेश्वरानें उज्जाला तडाका दिला
म्हणून दावीद फार खिन्न झाला. त्यानें त्या ठिकाणचें
नांव पेरेस-उज्जा (उज्जाहनन) ठेविलें; तें नांव आजवर
चालत आहे. ९ त्या दिवशीं दाविदास परमेश्वराचा
धाक वाटून तो म्हणाला, देवाचा कोश माझ्या घरीं
कसा आणावा? १० दावीद परमेश्वराचा कोश दावीद-
पुरांत घेऊन जाण्यास कबूल होईना; त्यानें तो
ओबेद-अदोम गित्ती याच्या घरीं एका बाजूस नेऊन
ठेविला. ११ परमेश्वराचा कोश ओबेद-अदोम गित्ती
याच्या घरीं तीन महिने राहिला; आणि परमेश्वरानें
ओबेद-अदोम व त्याचें सर्व घराणें यांस बरकत दिली.
१२ परमेश्वरानें ओबेद-अदोम याच्या घराण्यास व
त्याच्या सर्वस्वास बरकत दिली असें दावीद राजास कोणीं
सांगितलें; तेव्हां दाविदानें जाऊन देवाचा कोश ओबेद-
अदोमाच्या घरून दाविदपुरास मोठ्या आनंदानें
आणिला. १३ परमेश्वराचा कोश उचलणारे सहा
पावलें चालून गेले तेव्हां दाविदानें एक बैल व एक
पुष्ट गोऱ्हा यांचा यज्ञ केला. १४ दावीद सणाचें एफोद
कमरेस वेष्टून परमेश्वरासमोर आवेशानें नृत्य करीत
चालला. १५ दाविदानें व सर्व इस्राएल लोकांनीं परमे-
श्वराचा कोश जयजयकार करीत व शिंगें फुंकीत वर
आणिला. १६ परमेश्वराचा कोश दावीदपुरांत येत
असतां शौलाची कन्या मीखल हिनें खिडकींतून डोकावून
दावीद राजा परमेश्वरापुढें नाचतबागडत आहे हें पाहिलें,
तेव्हां तिच्या मनाला त्याचा वीट आला. १७ लोक
परमेश्वराचा कोश नगरांत घेऊन आले व त्याच्या
स्थानीं म्हणजे जो तंबू दाविदानें त्याच्यासाठीं उभा केला
होता त्यांत तो ठेविला; तेव्हां दाविदानें परमेश्वरास
होमबलि व शांत्यर्पणें अर्पिलीं. १८ होमबलि व
शांत्यर्पणें केल्यावर दाविदानें सेनाधीश परमेश्वर याच्या
नामानें लोकांस आशीर्वाद दिला. १९ मग त्यानें सर्व

प्रत्येकास म्हणजे इस्राएलाच्या समुदायांतील प्रत्येक
स्त्रीपुरुषास एक एक भाकर, मांसाचा एक एक तुकडा,
किसमिसांची एक एक ढेप अशीं वांटून दिलीं. मग
सर्व लोक घरोघर गेले. २० आपल्या घराण्यांतील
लोकांस आशीर्वाद द्यावयासाठीं दावीद परत आला.
तेव्हां शौलाची कन्या मीखल दाविदास भेटावयास
बाहेर आली व त्यास म्हणूं लागली, एकादा हलकट
मनुष्य उघडाबोडका होतो तसें आज इस्राएलाच्या
महाराजांनीं आपले दास व दासी यांच्यासमोर आपलें
शरीर उघडें केलें, तेव्हां इस्राएलाचे महाराज आज किती
वैभवशाली दिसले! २१ दावीद मिखलेस म्हणाला,
ज्या परमेश्वरानें तुझा बाप व त्याचें सर्व घराणें यांच्या-
ऐवजीं मला निवडून आपली प्रजा इस्राएल हिच्यावर
अधिपति नेमिलें त्या परमेश्वरासमोर मी नाचलों;
आणि परमेश्वरासमोर मी नाचणारच. २२ मी याहूनहि
तुच्छ बनेन; मी स्वतांच्या दृष्टीनें हीन होईन; पण ज्यांस
तूं दासी म्हणतेस त्या माझा आदरगौरव करितील.
२३ शौलाची कन्या मीखल हिला मरेपर्यंत कांहीं
अपत्य झालें नाहीं.

७ १ राजा आपल्या मंदिरांत राहूं लागला,
आणि परमेश्वरानें त्यास त्याच्या चोहोंकडल्या
शत्रूंपासून विसावा दिला, २ तेव्हां राजा नाथान
नामक संदेष्ट्यास म्हणाला, पाहा, मी गंधसरूच्या मंदिरांत
राहत आहें, पण, देवाचा कोश कनाथीच्या आंत राहत
आहे. ३ नाथान राजास म्हणाला, तुझ्या मनांत जें
कांहीं असेल तें कर. कारण परमेश्वर तुझ्याबरोबर आहे.
४ त्याच रात्रीं परमेश्वराचें वचन नाथानाला प्राप्त झालें,
तें असें: ५ जा, माझा सेवक दावीद यास सांग,
परमेश्वर म्हणतो, तूं माझ्या निवासासाठीं मंदिर
बांधणार काय? ६ मीं इस्राएल लोकांस मिसर
देशांतून बाहेर काढिलें त्या दिवसापासून आज
दिवसपर्यंत माझा निवास कधीं मंदिरांत झाला नाहीं;
डेऱ्यांतून व मंडपांतून मी भ्रमण करीत आहें.
७ मी इस्राएल लोकांसह जिकडेजिकडे भ्रमण करीत
फिरलों तिकडेतिकडे ज्या कोणा इस्राएल वंशाला
इस्राएल लोकांची जोपासना करण्याविषयीं मी आज्ञा
करीत असें त्यांस, तुम्हीं मजसाठीं गंधसरूचें मंदिर कां
बांधिलें नाहीं असा एक शब्द तरी मी कधीं बोललों
आहें काय? ८ तर आतां माझा सेवक दावीद यास
सांग, सेनाधीश परमेश्वर म्हणतो, तूं माझ्या प्रजेचा,
इस्राएलाचा अधिपति व्हावें म्हणून मीं तुला
मेंढवाड्यांतून मेंढरांच्या मागें फिरत असतां आणिलें.
९ जिकडे तूं गेलास तिकडे मी तुझ्याबरोबर राहिलों,
आणि तुझ्या सर्व शत्रूंचा तुजपुढून उच्छेद केला;
पृथ्वीवर जे पुरुष आजपर्यंत झाले आहेत त्यांच्या
नांवाप्रमाणें तुझें नांव मी थोर करीन. १० मी आपल्या
इस्राएल लोकांसाठीं एक स्थान नेमून देईन; मी तेथें
त्यांस रुजवीन म्हणजे ते आपल्या स्थानीं वस्ती करून
राहतील व ते तेथून पुढें कधीं ढळणार नाहींत.
११ इस्राएल लोकांवर मीं शास्ते नेमिले होते त्यांच्या
काळापासून जसे दुर्जन त्यांस त्रस्त करीत होते तसे ते
यापुढें करणार नाहींत; तुला मीं शत्रूंपासून विसावा
दिला आहे. परमेश्वर तुला म्हणत आहे कीं मी तुझें
घराणें कायमचें स्थापीन. १२ तुझे दिवस पुरे झाले
आणि तूं जाऊन आपल्या पितरांबरोबर निजलास म्हणजे
तुझ्या पोटच्या वंशजास तुझ्यामागून स्थापून त्याचें
राज्य स्थिर करीन. १३ तो माझ्या नामाप्रीत्यर्थ मंदिर
बांधील, मी त्याचें राजासन कायमचें स्थापीन.
१४ मी त्याचा पिता होईन व तो माझा पुत्र होईल;
त्यानें अधर्म केल्यास, मनुष्य जशी दंडानें व मानवपुत्र
जशी फटक्यांनीं शिक्षा करितात तशी मी त्यास शिक्षा
करीन; १५ पण तुझ्यापुढून घालवून दिलेल्या
शौलावरची कृपादृष्टि मीं दूर केली तशी त्याच्यावरची
माझी कृपादृष्टि दूर होणार नाहीं. १६ तुझें घराणें व
तुझें राज्य हीं तुजपुढें अढळ राहतील; तुझी गादी
कायमची स्थापीत होईल. १७ हीं सर्व वचनें व दर्शनें
जशांचीं तशीं नाथानानें दाविदास कळविलीं.

१८ मग दावीद राजा आंत जाऊन परमेश्वरासमोर
बसून म्हणाला, हे प्रभो देवा, मी कोण व माझें घराणें
तें काय कीं तूं मला येथवर आणावें? १९ हे

प्रभो परमेश्वरा, तुझ्या दृष्टीनें ही केवळ लहान गोष्ट आहे;
तूं आपल्या सेवकाच्या घराण्यासंबंधानें पुढील बऱ्याच
काळचें सांगून ठेविलें आहे; प्रभो परमेश्वरा, हें सर्व
तूं मानवी व्यवहारासारखें केलें आहे. २० दावीद
तुजपुढें आणखी काय बोलणार? प्रभो परमेश्वरा, तूं
आपल्या सेवकास ओळखितोस. २१ तूं आपल्या
वचनास्तव व आपल्या मनास आलें म्हणून हें थोर
कृत्य करून तें आपल्या सेवकाच्या निदर्शनास आणून
दिलें आहे. २२ यास्तव हे प्रभो परमेश्वरा, तूं थोर
आहेस; जें कांहीं आम्हीं आमच्या कानांनीं आजवर
ऐकलें आहे त्यावरून पाहतां तुझ्यासमान कोणी नाहीं;
तुझ्याशिवाय अन्य देव नाहीं. २३ तुझ्या इस्राएल
प्रजेसमान भूतलावर दुसरें कोणतें तरी राष्ट्र आहे काय?
आपली प्रजा करून घेण्यासाठीं इस्राएलास सोडविण्यास
तूं गेलास, आपलें नांव केलें, त्यांच्यासाठीं महत्कृत्यें
केलीं, आपल्या लोकांस मिसर देशांतून इतर राष्ट्रांच्या
व देवांच्या हातांतून सोडवून घेतलें आणि त्यांच्या-
देखत आपल्या देशासाठीं भयानक कृत्यें केलीं;
असें करावयास कोणत्या राष्ट्राचा देव गेला होता?
२४ इस्राएल लोकांनीं तुझी निरंतरची प्रजा व्हावें
म्हणून तूं त्यांची स्थापना केली; हे परमेश्वरा, तूं
त्यांचा देव झालास. २५ तर आतां, हे प्रभो परमेश्वरा,
आपला सेवक व त्याचें घराणें यांविषयीं जें वचन तूं
दिलें तें कायमचें सिद्धीस ने आणि आपल्या म्हणण्या-
प्रमाणें कर. २६ सेनाधीश परमेश्वर इस्राएलावर सत्ताधीश
आहे असें म्हणून लोकांनीं तुझ्या नामाचा निरंतर
महिमा वाढवावा आणि तुझा सेवक दावीद याचें घराणें
तुजसमोर स्थापीत व्हावें. २७ कारण हे सेनाधीश
परमेश्वरा, हे इस्राएलाच्या देवा, तूं माझे कान उघडून
सांगितलें कीं मी तुझें घराणें स्थापीन; म्हणून ही
विनंति तुला करावयाची हिम्मत तुझ्या सेवकास आली.
२८ आतां हे प्रभो परमेश्वरा, तूंच देव आहेस व तुझीं
वचनें सत्य आहेत; आणि तूं आपल्या सेवकाचें अशा
प्रकारें बरें करण्याविषयीं वचन दिलें आहे; २९ तर
आतां प्रसन्न होऊन आपल्या सेवकाच्या घराण्यास
अशी बरकत दे कीं तें तुझ्या दृष्टीसमोर निरंतर कायम
राहील; कारण हे प्रभो परमेश्वरा, तूंच हें म्हटलें आहे;
तुझ्या सेवकाच्या घराण्याचें तुझ्या आशीर्वादानें
सदा अभीष्ट होवो.

८ १ यानंतर दाविदानें पलिष्ट्यांस मार देऊन
अंकित केलें आणि त्यांच्या मातृनगराची सत्ता त्यांचे
हातून काढून घेतली. २ मग त्यानें मवाबास मार
दिला; त्यांस जमिनीवर निजवून दोरीनें मापिलें आणि
जे दोन दोऱ्या भरले त्यांस ठार मारिलें, व जे एक
दोरी भरले त्यांस सोडून दिलें. मवाबी दाविदाचे अंकित
होऊन त्यास करभार देऊं लागले. ३ सोबाचा राजा
रहोबपुत्र हददेजर हा महानदाजवळ आपली सत्ता
पुनः स्थापीत करूं पाहत होता त्याचा दाविदानें
मोड केला. ४ दाविदानें एक हजार सातशें स्वार आणि
वीस हजार पायदळ हीं त्याजपासून हस्तगत केलीं;
रथांच्या सर्व घोड्यांच्या शिरा दाविदानें तोडिल्या, मात्र
त्यांतून शंभर घोडे राखून ठेविले. ५ दिमिष्क येथील
अरामी लोक सोबाचा राजा हददेजर याची कुमक
करावयास आले तेव्हां दाविदानें त्यांतल्या बावीस हजार
लोकांचा संहार केला. ६ मग दाविदानें दिमिष्काच्या
आसमंतांतील अराम प्रांतांत ठाणीं बसविलीं; अरामी
दाविदाचे अंकित होऊन त्यास करभार देऊं लागले.
जिकडेजिकडे दावीद जाई तिकडेतिकडे परमेश्वर
त्यास यश देई. ७ हददेजर राजाच्या सेवकांजवळ
सोन्याच्या ढाली होत्या त्या दाविदानें घेऊन
यरुशलेमास आणिल्या. ८ हददेजर याचीं बेटा व
बेरोथा हीं नगरें होतीं, तेथून दावीद राजानें पुष्कळ
पितळ आणिलें. ९ दाविदानें हददेजराची सारी सेना
मारिली हें हमाथाचा राजा तोई याच्या कानावर गेलें;
१० दाविदानें हददेजराशीं युद्ध करून त्याचा मोड
केला होता म्हणून तोई राजानें दावीद राजाचें
क्षेमकुशल विचारण्यास व त्याचें अभिनंदन करण्यास
आपला पुत्र योराम याला त्याजकडे पाठविलें; कारण
हददेजर व तोई यांच्या लढाया होत असत. योरामानें
आपल्याबरोबर चांदीचीं, सोन्याचीं व पितळेचीं पात्रें

आणिलीं; ११ सर्व जिंकिलेल्या राष्ट्रांतून लुटून आणि-
लेल्या चांदीसोन्याबरोबर हींहि पात्रें दावीद राजानें
परमेश्वराला समर्पिलीं; १२ अरामी, मवाबी,
अम्मोनी, पलिष्टी, अमालेकी आणि सोबाचा राजा
रहोबपुत्र हददेजर या सर्वांपासून मिळविलेली ही लूट
होती. १३ दावीद क्षार खोऱ्यांत अठरा हजार
अराम्यांस मारून परत आला तेव्हां त्याचें नांव झालें.
१४ त्यानें अदोमांत शिपायांचीं ठाणीं बसविलीं;
अदोमाच्या सर्व प्रांतांत त्यानें ठाणीं बसविलीं व सर्व
अदोमी लोक दाविदाचे अंकित झाले. दावीद जेथें
गेला तेथें परमेश्वरानें त्यास यश दिलें.

१५ दाविदानें सर्व इस्राएलावर राज्य केलें;
तो आपल्या सर्व प्रजेशीं न्यायानें व धर्मानें वर्ते.
१६ त्याचा मुख्य सेनापति सरूवेचा पुत्र यवाब हा
होता, व त्याचा अखबारनवीस अहीलुदाचा पुत्र
यहोशाफाट हा होता; १७ अहीटूबाचा पुत्र सादोक
आणि अब्याथाराचा पुत्र अहीमलेख हे याजक होते,
आणि सराया हा चिटणवीस होता; १८ करेथी व
पलेथी यांच्यावर यहोयादाचा पुत्र बनाया हा होता;
दाविदाचे पुत्र मंत्री होते.

१ योनाथानाकरितां ज्यावर आपण दया करावी
९ असा कोणी शौलाच्या घराण्यांतला अजून उरला
आहे काय अशी चौकशी दाविदानें केली.
२ शौलाच्या घराण्याचा सीबा नामक एक सेवक होता,
त्यास दाविदाकडे बोलावून आणिलें; राजानें त्यास
विचारिलें, तूं सीबा आहेस काय ? त्यानें म्हटलें, मीच तो
आपला दास. ३ राजानें त्यास विचारिलें, ज्यावर देवाप्रीत्यर्थ
मीं दया करावी असा कोणी शौलाच्या घराण्यात अजून
आहे काय ? सीबा राजास म्हणाला, योनाथानाचा एक
पुत्र अजून आहे, तो पायांनीं लंगडा आहे. ४ राजानें
त्यास विचारिलें, तो कोठें आहे ? सीबानें राजास म्हटलें,
पाहा, तो लो-दबार येथें माखीर बिन अम्मीएल
याच्या घरीं असतो. ५ तेव्हां दावीद राजानें माणूस
पाठवून त्यास लो-दबाराहून माखीर बिन अम्मीएल
याच्या घरून बोलावून आणिलें. ६ मफीबोशेथ बिन
योनाथान बिन शौल यानें येऊन दाविदास भूमीपर्यंत
लवून दंडवत घातलें. दावीद म्हणाला, मफीबोशेथा;
तो म्हणाला, आपला दास हजर आहे. ७ दावीद
त्यास म्हणाला, भिऊं नको; तुझा बाप योनाथान
याच्याकरितां मी तुजवर अवश्य दया करीन; तुझा
बाप शौल याची सर्व जमीन तुला परत देईन;
आणि तूं नित्य माझ्या पंक्तीस भोजन करावें. ८ तो
प्रणाम करून म्हणाला, आपण अशा मजसारख्या
मेलेल्या कुत्र्यावर कृपादृष्टि करावी असा आपला
दास कोण आहे ? ९ मग राजानें शौलाचा सेवक
सीबा यास बोलावून सांगितलें, जें कांहीं शौलाचें व
त्याच्या घराण्याचें होतें तें सर्व मी तुझ्या धन्याच्या
पुत्रास देतों. १० तर तूं आपले पुत्र व चाकर यांसह
त्याच्या जमिनीची लागवड कर; तुझ्या धन्याच्या पुत्राच्या
निर्वाहासाठीं शेताचें उत्पन्न आणीत जा; पण तुझ्या
धन्याचा पुत्र मफीबोशेथ माझ्या पंक्तीस नित्य भोजन
करील. सीबाचे पंधरा पुत्र व वीस चाकर होते.
११ सीबा राजास म्हणाला, माझे स्वामीराजे यांनीं
आपल्या दासास केलेल्या आज्ञेप्रमाणें सर्व कांहीं आपला
दास करील. त्याप्रमाणें मफीबोशेथ इतर राजपुत्रां-
प्रमाणें दाविदाच्या पंक्तीस नित्य भोजन करीत असे.
१२ मफीबोशेथास मीखा नांवाचा एक लहान पुत्र
होता. सीबाच्या घरीं राहणारे सर्व जण मफीबोशेथाचे
चाकर होते. १३ मफीबोशेथ यरुशलेमांत राहिला;
कारण तो राजाच्या पंक्तीस नित्य भोजन करीत असे;
तो दोन्ही पायांनीं लंगडा होता.

१ पुढें अम्मोनी लोकांचा राजा मृत्यु
१० पावला व त्याच्या गादीवर त्याचा पुत्र हानून
बसला. २ तेव्हां दाविदानें मनांत आणिलें कीं
हानूनाचा बाप नाहाश यानें आपल्यावर दया केली तशीच
आपण त्याच्या पुत्रावर दया करावी; म्हणून दाविदानें
त्याच्या बापाच्या मृत्यूबद्दल त्याचें समाधान करावयास
आपल्या सेवकांच्या हातीं त्यास सांत्वनाचा निरोप
पाठविला. मग दाविदाचे सेवक अम्मोनी लोकांच्या
देशीं आले. ३ त्या वेळीं अम्मोनी लोकांचे सरदार

आपला स्वामी हानून यास म्हणाले कीं दाविदानें आपलें
समाधान करण्यास लोक पाठविले आहेत ते आपल्या
बापाविषयींची आदरबुद्धि दर्शविण्याकरितां पाठविले
आहेत असें आपल्याला वाटतें काय ? या नगराची पाहणी
व टेहळणी करून त्याचा विध्वंस करावा म्हणून दाविदानें
आपले चाकर पाठविले आहेत, नाहीं काय ? ४ तेव्हां
हानुनानें दाविदाच्या सेवकांस पकडिलें व त्यांची
अर्धीअर्धी दाढी काढवून व त्यांचीं वस्त्रें मधोमध
कुल्यापर्यंत कापून टाकून त्यांस लावून दिलें. ५ हें
वर्तमान ऐकून दाविदानें त्यांची वाटेंत गांठ घेण्यास
मनुष्य पाठविले; कारण त्यांस मोठी लाज वाटत होती.
राजानें त्यांस सांगून पाठविलें कीं तुमची दाढी
वाढेपर्यंत तुम्ही यरीहो येथें राहा, मग इकडे या.
६ दाविदाला आपली किळस आली आहे असें अम्मोनी
लोकांनीं पाहिलें तेव्हां त्यांनीं बेथ-रहोब येथले अरामी
व सोबा येथले अरामी मिळून वीस हजार पायदळ,
माका राजाचे एक हजार शिपाई व तोबाचे बारा
हजार शिपाई मोल देऊन बोलाविले. ७ हें ऐकून
दाविदानें यवाबास योद्ध्यांच्या सर्व सैन्यासह पाठविलें.
८ तेव्हां अम्मोनी लोकांनीं बाहेर पडून वेशीनजीक
व्यूह रचिला; इकडे सोबा व रहोब येथले अरामी
आणि तोब व माका यांचे शिपाई हे निराळ्या ठिकाणीं
मैदानांत युद्धास आले. ९ आपल्यामागें व पुढें व्यूह
रचिला आहे हें यवाबानें पाहून इस्राएल लढवय्यांतील
निवडक शिपाई घेऊन त्यांस अराम्यांसमोर उभें केलें;
१० आणि बाकीचे लोक त्यानें आपला भाऊ अबीशय
याच्या हातीं दिले, व त्यानें अम्मोन्यांसमोर त्यांची
व्यूहरचना केली. ११ तो म्हणाला, अरामी मजहून
प्रबल होऊं लागले तर तूं माझें साहाय्य कर, पण
अम्मोनी तुजहून प्रबल झाले तर मी तुझें साहाय्य
करीन. १२ हिंमत धर, आपण आपल्या लोकांसाठीं
आणि आपल्या देवाच्या नगरांसाठीं लढाईची शिकस्त
करूं, मग परमेश्वर मर्जीस येईल तसें करो.
१३ मग यवाब व त्याच्याबरोबरचे लोक अराम्यांशीं
युद्ध करावयास जवळ गेले, तेव्हां ते त्याच्यापुढून
पळून गेले; १४ अरामी पळून गेले हें पाहून अम्मोनी
लोकहि अबीशयाच्या पुढून पळून जाऊन नगरांत
शिरले. तेव्हां यवाब अम्मोन्यांशीं लढण्याचें सोडून
यरुशलेमास परत आला. १५ इस्राएलापुढें आपण
पराजित झालों असें अरामी लोकांनीं पाहिलें तेव्हां
ते एकत्र जमा झाले. १६ हदरेजरानें[1] जासूद पाठवून
महानदापलीकडील अराम्यांस आणविलें; हदरेजराच्या
सैन्याचा सेनापति शोबख याच्या नायकत्वाखालीं ते
हेलाम येथें आले. १७ हें ऐकून दाविदानें अवघ्या
इस्राएलांस एकत्र केलें व यार्देनेपार जाऊन तो हेलामास
पोहंचला. तेथें अरामी दाविदाविरुद्ध व्यूह रचून
त्याजशीं लढले. १८ तेव्हां अरामी इस्राएलापुढून
पळून गेले आणि दाविदानें अराम्यांचे सातशें रथी व
चाळीस हजार राऊत ठार केले आणि त्यांचा सेनापति
शोबख यास घायाळ केलें; तो तेथेंच गतप्राण झाला.
१९ इस्राएलापुढें आपण पराजित झालों हें पाहून
हदरेजर राजाचे जितके अंकित होते तितक्यांनीं
इस्राएलाशीं सल्ला केला व ते त्याचे अंकित झाले; आणि
अम्मोनी लोकांस इत:पर साहाय्य करण्याची अराम्यांस
धास्ती वाटली.

१ राजे लोक युद्धाच्या मोहिमेस जातात

**११** त्या समयीं म्हणजे वर्षारंभीं दाविदानें यवाबास
व त्याच्याबरोबर त्याचे नोकरचाकर व सर्व
इस्राएल लोक यांस पाठविलें; त्यांनीं अम्मोन्यांचा
संहार करून राब्बा नगरास वेढा घातला; पण दावीद
यरुशलेमासच राहिला.

२ संध्याकाळच्या समयीं दावीद पलंगावरून उठून
राजमंदिराच्या गच्चीवर जाऊन फिरूं लागला; तेव्हां
एक स्त्री स्नान करितांना त्यानें तेथून पाहिली; ती स्त्री
दिसावयाला फार सुंदर होती. ३ मग दाविदानें चाकर
पाठवून त्या स्त्रीविषयीं विचारपूस केली; तेव्हां कोणी
म्हटलें कीं ती अलीयमाची कन्या व उरीया हित्ती याची
बायको बथशेबा आहे ना ? ४ तेव्हां दाविदानें जासूद
पाठवून तिला बोलावून आणिलें, व ती दाविदाकडे आली

१ अथवा : हददजर; अ० ८.३ पाहा.

आणि दाविदानें तिजशीं प्रसंग केला; (ती आपल्या
अशुद्धतेपासून शुद्ध झाली होती;) मग ती आपल्या
घरीं गेली. ५ त्या स्त्रीला गर्भ राहिला; तेव्हां तिनें
दाविदास सांगून पाठविलें, मी गरोदर आहें.
६ दाविदानें यवाबास निरोप पाठविला कीं उरीया हित्ती
याला मजकडे पाठवून द्या; तेव्हां त्यानें त्यास दाविदाकडे
पाठविलें. ७ उरीया दाविदाकडे आला तेव्हां त्यानें
त्यास यवाब व त्याचे लोक कसे काय आहेत आणि युद्ध
कसें चाललें आहे हें विचारिलें. ८ मग दावीद उरीयास
म्हणाला, आपल्या घरीं जा व हातपाय धू. उरीया
राजमंदिरांतून निघाला व त्याच्या पाठोपाठ राजाकडून
त्यास कांहीं इनाम गेलें. ९ उरीया आपल्या स्वामीच्या
इतर सर्व चाकरांबरोबर राजवाड्याच्या दारींच निजून
राहिला, आपल्या घरीं गेला नाहीं. १० उरीया
आपल्या घरीं गेला नाहीं हें दाविदानें ऐकलें तेव्हां
तो त्यास म्हणाला, तूं प्रवास करून आला आहेस ना?
तर तूं आपल्या घरीं कां जात नाहींस? ११ उरीया
दाविदास म्हणाला, कोश, इस्राएल व यहूदा मांडवांत
राहत आहेत आणि माझा धनी यवाब व माझ्या धन्याचे
सेवक खुल्या मैदानांत तळ देऊन आहेत; असें असतां मी
घरीं जाऊन खाऊंपिऊं आणि आपल्या स्त्रीबरोबर
निजूं काय? आपल्या जीविताची शपथ, आपल्या प्राणाची
शपथ, मी असलें काम करणार नाहीं. १२ दावीद
उरीयास म्हणाला, आजहि येथेंच राहा; उद्यां मी तुला
रवाना करीन. मग उरीया त्या दिवशीं व दुसऱ्या
दिवशींहि यरुशलेमांत राहिला. १३ दाविदानें बोला-
विल्यावरून त्यानें येऊन त्याच्यासमोर खाणेंपिणें केलें व
त्यास त्यानें दारू पाजून मस्त केलें. संध्याकाळ झाला तेव्हां
तो आपल्या स्वामीच्या सेवकांबरोबर आपल्या खाटेवर
निजावयास गेला, पण घरीं गेला नाहीं. १४ सकाळीं
दाविदानें यवाबाच्या नांवें पत्र लिहून उरीयाच्या हातीं
पाठविलें. १५ त्या पत्रांत असें लिहिलें होतें कीं तुंबळ
युद्धाच्या तोंडीं उरीयास ठेवा; आणि त्यास तेथेंच सोडून
मागें हटा; म्हणजे त्यास मार लागून तो मरेल. १६ मग
यवाबानें नगराची चांगली टेहळणी करून जेथें शूर
योद्धे असल्याचें त्याला माहीत होतें तेथें उरीयास
नेमिलें. १७ मग नगरांतील पुरुषांनीं बाहेर पडून
यवाबाशीं युद्ध केलें; तेव्हां दाविदाच्या सेवकांपैकीं
कांहीं कामास आले आणि उरीया हित्ती हाहि गतप्राण
झाला. १८ मग यवाबानें जासूद पाठवून दाविदास सर्व
युद्धाचा अहवाल कळविला; १९ त्यानें जासुदास आज्ञा
केली कीं तूं युद्धाची सर्व हकीकत राजास कळविल्यावर,
२० राजा जर संतापून म्हणाला कीं तुम्हीं त्या
नगराच्या एवढें जवळ जाऊन कां युद्ध केलें? शत्रु
तटावरून बाण सोडितील हें तुम्हांस ठाऊक नव्हतें
काय? २१ यरुब्बेशेथाचा पुत्र अबीमलेख यास कोणीं
मारिलें? तेबेसांत त्याजवर एका बायकोनें कोटावरून
जात्याची वरली तळी टाकून त्याचा प्राण घेतला कीं
नाहीं? तर तुम्ही तटाच्या एवढें जवळ कां गेलां?
तेव्हां त्याला तूं एवढेंच सांग कीं आपला सेवक उरीया
हित्ती हाहि मृत्यु पावला. २२ तेव्हां जासुदानें जाऊन
यवाबाचा सर्व निरोप निवेदन केला. २३ जासूद
दाविदास म्हणाला, ते लोक आम्हांस भारी होऊन
मैदानांत आम्हांवर चालून आले, व आम्हीं त्यांस
वेशीपर्यंत हटविलें. २४ मग तिरंदाजांनीं तटावरून
आपल्या सेवकांवर बाण सोडिले; राजाचे कित्येक लोक
कामास आले व आपला सेवक उरीया हित्ती हाहि कामास
आला. २५ दावीद त्या जासुदास म्हणाला, तूं जाऊन
यवाबास सांग, यावरून तूं उदास होऊं नको; कारण
तरवार दोन्ही पक्षांचा सारखा संहार करिते, तर तूं
अधिक नेटानें त्या नगराशीं लढून त्याचा विध्वंस कर;
या प्रकारें तूं त्यास हिंमत दे. २६ आपला नवरा
उरीया मृत्यु पावला आहे असें उरीयाच्या स्त्रीनें ऐकलें.
तेव्हां ती नवऱ्यासाठीं शोक करूं लागली. २७ तिचें
सुतक संपल्यावर दाविदानें लोक पाठवून तिला
आपल्या घरीं बोलावून आणून ठेवून घेतलें व ती त्याची
स्त्री झाली. पुढें तिला पुत्र झाला; पण दाविदानें हें जें
कृत्य केलें त्यावरून परमेश्वराची त्याजवर इतराजी झाली.

१२ १ मग परमेश्वरानें नाथानास दाविदाकडे
पाठविलें. तो त्याजकडे जाऊन म्हणाला, एका
नगरांत दोन मनुष्य राहत होते; त्यांतला एक
श्रीमंत व दुसरा गरीब होता. २ त्या श्रीमंत मनुष्याचीं
मेंढरें व गुरें विपुल होतीं; ३ पण त्या गरिबापाशीं
एका लहानशा मेंढीखेरीज कांहींच नव्हतें. त्यानें
ती विकत घेऊन तिचें संगोपन केलें होतें; ती
*त्याजबरोबर* व *त्याच्या* मुलांबाळांबरोबर *लहानाची*
मोठी झाली; ती त्याच्या घासांतला घास खात
असे. त्याच्या पेल्यांतून पाणी पीत असे व त्याच्या
उराशीं निजत असे; ती त्याची मुलगीच बनली होती.
४ एकदा त्या श्रीमंतापाशीं एक पाहुणा आला, तेव्हां
त्याच्यापाशीं आलेल्या त्या पाहुण्यासाठीं भोजन तयार
करावें म्हणून त्यानें आपल्या शेरडांमेंढरांतून अथवा
गाईबैलांतून एकादें न घेतां त्या गरीब मनुष्याची ती
मेंढी घेऊन आपल्या पाहुण्यासाठीं भोजन तयार
केलें. ५ हें ऐकून त्या मनुष्यावर दाविदाचा कोप
भडकला व तो नाथानास म्हणाला, परमेश्वराच्या
जीविताची शपथ, ज्या मनुष्यानें हें काम केलें तो
प्राणदंडास पात्र आहे; ६ त्यानें हें कृत्य केलें व
त्याला कांहीं दयामाया वाटली नाहीं म्हणून त्यानें त्या
मेंढीच्या चौपट बदला दिला पाहिजे.

७ नाथान दाविदास म्हणाला, तो मनुष्य तूंच
आहेस. इस्राएलाचा देव परमेश्वर म्हणतो, मीं तुला
अभिषेक करून इस्राएलाचा राजा केलें व तुला
शौलाच्या हातांतून सोडविलें; ८ मग तुझ्या स्वामीचें
मंदिर *मीं तुला दिलें,* त्याच्या स्त्रिया *तुझ्या* उराशीं
दिल्या, इस्राएल व यहूदा यांचें घराणें तुला दिलें,
आणि एवढें जर थोडें झालें असतें तर मीं तुला आणखी
हवें तें दिलें असतें. ९ तूं परमेश्वराची आज्ञा तुच्छ
मानून त्याच्या दृष्टीनें वाईट असें हें कृत्य कां केलें?
उरीया हित्ती ह्याचा तूं तरवारीनें घात केला, त्याची बायको
आपल्या घरांत घातली आणि उरीयाचा अम्मोन्यांच्या
तरवारीनें वध करविला. १० तर आतां तरवार
तुझें घर सोडणार नाहीं, कारण तूं मला तुच्छ मानून
उरीया हित्ती ह्याची स्त्री आपल्या घरांत घातली आहे.
११ परमेश्वर म्हणतो, पाहा, मी तुझ्याच घरांतून
तुजवर अरिष्ट उभें करीन; तुझ्या स्त्रिया तुझ्यादेखत
तुझ्या शेजाऱ्यास देईन; तो ह्या सूर्यादेखत त्यांची
अब्रू घेईल. १२ तूं तें काम गुप्तपणें केलें, पण मी हें
सर्व इस्राएलादेखत, ह्या सूर्यादेखत करीन. १३ दावीद
नाथानास म्हणाला, मीं परमेश्वराविरुद्ध पातक केलें आहे.
*नाथान दाविदास म्हणाला,* परमेश्वरानें तुझें पातक दूर
केलें आहे; तूं मरावयाचा नाहींस. १४ तरी तूं हें काम
करून परमेश्वराच्या शत्रूंस उपहास करावयास निमित्त
दिलें आहे; यास्तव तुला जो पुत्र झाला आहे तो
खात्रीनें मरणार. १५ मग नाथान आपल्या घरीं गेला.

उरीयाच्या स्त्रीस जो मुलगा दाविदापासून झाला
त्याजवर परमेश्वराचा तडाका येऊन तो फार आजारी
पडला; १६ म्हणून दावीद त्या मुलासाठीं परमेश्वराची
काकळूत करूं लागला. त्यानें उपास केला व तो आंत
जाऊन रात्रभर जमिनीवर पडून राहिला. १७ त्याच्या
घरचीं म्हातारीं माणसें त्याच्याकडे येऊन त्याला
जमिनीवरून उठवूं लागलीं; तो उठेना व *त्यांच्याबरोबर*
बसून भोजन करीना. १८ सातव्या दिवशीं तें मूल मेलें;
पण मूल मेलें आहे हें दाविदास सांगण्यास त्याच्या
चाकरांना भय वाटलें; ते म्हणाले, मूल जीवंत असतां
आम्हीं त्याला समजाविलें पण त्यानें ऐकलें नाहीं; तर
मूल मरण पावलें आहे असें त्याला कळविलें तर तो
स्वतांला अपाय करून घ्यावयाचा. १९ आपले चाकर
आपसांत कुजबुजत आहेत हें पाहून आपलें मूल मेलें
आहे असें दाविदानें ताडिलें; *त्यानें त्यांस* विचारिलें,
मूल मेलें काय? ते म्हणाले, मेलें. २० मग दावीद
जमिनीवरून उठला; त्यानें स्नान करून तैलाभ्यंग केला,
आपला पोशाक बदलला आणि परमेश्वराच्या मंदिरांत
जाऊन दंडवत घालून आराधना केली; मग तो आपल्या
मंदिरांत आला, व त्यानें सांगितल्यावरून त्याच्या
सेवकांनीं त्याजपुढें अन्न वाढिलें, तें त्यानें सेवन केलें.
२१ त्याच्या चाकरांनीं त्यास विचारिलें, आपण हें असें
काय केलें? मूल जीवंत होतें तोंवर आपण त्याच्यासाठीं

उपास व शोक केला, पण तें मरण पावतांच आपण
उठून भोजन केलें. २२ त्यानें उत्तर केलें, मूल जिवंत
होतें तोंवर मीं उपास केला व रुदन केलें. मला वाटलें,
न जाणो, कदाचित् परमेश्वर मजवर कृपा करील व
मूल जिवंत राहील; २३ पण आतां तें मरण पावलें
तर मीं आतां कां उपास करावा? माझ्यानें थोडेंच
त्याला परत आणववेल? मी त्याजकडे जाईन, पण
तें मजकडे परत यावयाचें नाहीं. २४ मग दाविदानें
आपली स्त्री बथशेबा हिचें सांत्वन केलें व तो तिच्यापाशीं
जाऊन निजला. त्यानंतर तिला पुत्र झाला, त्यानें त्याचें नांव
शलमोन हें ठेविलें; परमेश्वराला तो प्रिय झाला.
२५ त्यानें नाथान संदेष्टा याच्या द्वारें सांगून पाठविल्या-
वर परमेश्वराकरितां त्याचें नांव यदीद्या (परमेश्वराला
प्रिय) असें ठेविलें.

२६ नंतर यवाबानें अम्मोन्याचें राब्बा याशीं
लढून राजनगर काबीज केलें. २७ यवाबानें दाविदाकडे
जासूद पाठवून त्यास कळविलें कीं मी राब्बा नगरा-
बरोबर लढलों व तें जलनगर हस्तगत केलें. २८ तर
आतां अवशिष्ट लोक जमा करून नगरापुढें छावणी
करून तें हस्तगत करा; मीं तें घ्यावें व माझें
नांव व्हावें असें न होवो. २९ तेव्हां दावीद
सर्व लोकांस जमा करून राब्बा नगराकडे गेला,
व त्यानें तें लढून घेतलें. ३० त्यानें त्या लोकांच्या
राजाच्या मस्तकावरून मुकुट काढिला; त्याचें वजन एक
सोन्याचा किक्कार असून तो रत्नखचित होता; तो
दाविदाच्या मस्तकावर ठेविला. त्यानें त्या नगरांतून
पुष्कळ लूट आणिली. ३१ त्यानें त्या नगराच्या
रहिवाश्यांस बाहेर काढिलें, व त्यांस करवती, लोखंडी
दाताळीं, लोखंडी कुऱ्हाडी यांचें आणि विटांच्या
भट्ट्यांचें काम करावयास लाविलें; अम्मोन्यांच्या
सर्व नगरांचेंहि त्यानें असेंच केलें. मग दावीद सर्व
लोकांसह यरुशलेमास परत आला.

१ यानंतर असें झालें कीं दाविदाचा पुत्र
१३ अबशालोम याची एक सुंदर बहीण होती
तिचें नांव तामार; दाविदाचा पुत्र अम्नोन हा
तिजवर मोहित झाला. २ अम्नोन आपली बहीण तामार
हिच्यामुळें इतका बेचैन झाला कीं तो आजारी पडला.
ती कुमारी होती म्हणून तिजशीं कमीजास्त करणें
अम्नोनास दुष्कर होतें. ३ अम्नोनाचा योनादाब नांवाचा
एक मित्र होता, तो दाविदाचा भाऊ शिमा याचा पुत्र;
तो मोठा चतुर होता. ४ तो अम्नोनास म्हणाला, राज-
कुमारा, तूं दिवसानुदिवस असा क्षीण कां होत चाललास
आहेस? मला नाहीं का सांगत? अम्नोनानें त्यास उत्तर
दिलें, माझा बंधु अबशालोम याची बहीण तामार
हिच्यावर माझें मन बसलें आहे. ५ योनादाब त्यास
म्हणाला, तूं आपल्या पलंगावर निजून आजाऱ्याचें
मिष कर, व तुझा बाप तुझा समाचार घेण्यास आला
म्हणजे तूं त्यास सांग, कसेंहि करून माझी बहीण
तामार हिनें येऊन मला अन्न चारावें, तिनें तें अन्न
माझ्यादेखत तयार करावें म्हणजे मी तें प्रत्यक्ष पाहून
तिच्या हातून खाईन. ६ मग अम्नोनानें अंथरुणावर
पडून आजाऱ्याचें मिष केलें; राजा त्याच्या समाचारास
गेला तेव्हां अम्नोन राजास म्हणाला, एवढें करा, माझी
बहीण तामार हिनें मजकडे येऊन दोन पोळ्या माझ्या-
देखत तयार कराव्या, म्हणजे त्या मी तिच्या हातून
खाईन. ७ दाविदानें अंतर्गृहांत तामारेला सांगून
पाठविलें कीं तुझा भाऊ अम्नोन याच्या घरीं जा व
त्याच्यासाठीं अन्न तयार कर, ८ तामार आपला भाऊ
अम्नोन याच्या घरीं गेली; तो अंथरुणास खिळला
होता. तिनें पीठ घेऊन मळिलें व त्याच्यादेखत
पोळ्या करून भाजिल्या. ९ तिनें त्याच्यापुढें ताट ठेवून
त्यांत त्या घातल्या; पण तो त्या कांहीं केल्या खाईना.
अम्नोन म्हणाला, माझ्याजवळच्या सर्व लोकांस बाहेर
घालवा; तेव्हां सर्व लोक तेथून निघून गेले. १० मग
अम्नोन तामारेस म्हणाला, जेवण माझ्या खोलींत
घेऊन ये म्हणजे मी तुझ्या हातून खाईन. त्यावरून तामार
आपण केलेल्या पोळ्या आपला भाऊ अम्नोन याच्याकडे

१ **पाठभेद:** मिलकोम मूर्तीच्या; १ राजे ११:५ पाहा. २ निर्गम २५:३९ पाहा. ३ **पाठभेद:** यांच्या खालीं आणिलें व विटांच्या भट्ट्यांतून त्यांस चालविलें.

खोलींत घेऊन गेली. ११ त्या पोळ्या त्यानें खाव्या
म्हणून त्याजपाशीं ती घेऊन गेली तेव्हां त्यानें तिला
धरून म्हटलें, माझ्या भगिनी, येऊन माझ्यापाशीं नीज.
१२ ती म्हणाली, माझ्या बंधो, छे, माझ्यावर बलात्कार
करूं नको; इस्राएलांत असलें कर्म करूं नये; असें
दुष्कृत्य करूं नको. १३ माझी बेअब्रू झाल्यास ती
मी कोठें लपवूं? व तुझी तर इस्राएलांतल्या मूर्खांत
गणना होईल; यास्तव राजाशीं बोलणें लाव, म्हणजे तो
मला तुला देण्याचें नाहीं म्हणणार नाहीं; १४ पण तो
कांहींकेल्या तिचें ऐकेना व तो तिच्यापेक्षां बळकट
असल्यामुळें त्यानें तिजवर बलात्कार करून तिला भ्रष्ट
केलें. १५ मग अम्नोनास तिचा अत्यंत तिरस्कार
वाटला, तो एवढा कीं त्याची तिजवर प्रीति होती
तिच्याहून हा तिरस्कार अधिक होता; मग अम्नोन तिला
म्हणाला, उठून चालती हो. १६ ती म्हणाली, असें
करूं नको; तूं मजशीं दुष्कर्म केलें त्याहून मला
घालवून देणें हा गुन्हा मोठा आहे; पण तो तिचें
ऐकेना. १७ त्यानें त्याच्या खिजमतींतल्या एका
चाकरास बोलावून सांगितलें, या स्त्रीस मजपासून बाहेर
घालीव व हिच्यामागून दरवाजास खीळ घाल.
१८ ती त्या वेळीं पायघोळ झगा ल्याली होती; राजकन्या
कुमारी असतां असे झगे घालीत असत. अम्नोनाच्या
चाकरानें तिला बाहेर घालवून दरवाजास खीळ
घातली. १९ तामारेनें आपल्या डोक्यांत राख घातली,
आपल्या अंगावरचा पायघोळ झगा फाडून टाकिला
व डोक्यावर हात ठेवून वाटेनें ती रडत ओरडत
चालली. २० तिचा भाऊ अबशालोम तिला म्हणाला,
माझ्या भगिनी, तुझा भाऊ अम्नोन हा तुझ्यापाशीं
गेला ना? तर गप बैस; तो तुझा भाऊ आहे; तूं या
गोष्टीचा खेद करूं नको; तेव्हां तामार आपला भाऊ
अबशालोम याच्या घरीं उदास होऊन राहिली. २१ या
सर्व गोष्टी दावीद राजाच्या कानीं आल्या तेव्हां त्यास
फार क्रोध आला. २२ अबशालोम अम्नोनास बरेंवाईट
कांहीं बोलला नाहीं; अम्नोनानें त्याची बहीण तामार
भ्रष्ट केली म्हणून अबशालोमानें त्याशीं वैर धरिलें.

२३ पुरीं दोन वर्षें गेल्यावर एफ्राइमानजीक
बालहासोर गांवीं अबशालोमानें आपल्या मेंढरांची
लोकर कातरविली; त्या समयीं सर्व राजकुमारांस
आमंत्रण केलें. २४ तो राजापाशीं जाऊन म्हणाला,
माझी अशी विनंति आहे कीं आपल्या सेवकाच्या मेंढ्यांच्या
लोकरीची कातरणी आहे म्हणून राजानें आपले चाकर
घेऊन या सेवकाबरोबर चालावें. २५ राजा अबशा-
लोमास म्हणाला, माझ्या पुत्रा, नाहीं, आम्ही सर्वांनीं
येणें बरें नाहीं; आमचा भार तुजवर पडूं नये. त्यानें
फार आग्रह केला तरी तो गेला नाहीं, पण त्यानें
त्यास आशीर्वाद दिला. २६ मग अबशालोम म्हणाला,
आपण येत नाहीं तर माझा भाऊ अम्नोन याला तरी
आमच्याबरोबर येऊं द्या. राजानें त्यास विचारलें,
त्यानें तुजबरोबर कां यावें? २७ अबशालोमानें त्यास
एवढा आग्रह केला कीं त्यानें अम्नोनास व सर्व राज-
कुमारांस त्याजबरोबर जाऊं दिलें. २८ अबशालोमानें
आपल्या सर्व सेवकांस अशी ताकीद देऊन ठेविली
कीं सावध राहा, अम्नोन द्राक्षारस पिऊन रंगांत आला
म्हणजे मीं तुम्हांस इषारा केल्यावरोबर तुम्ही अम्नोना-
वर प्रहार करून त्यास ठार करा, कांहीं भिऊं नका;
मी तुम्हांस हुकूम करितों आहेंना? हिंमत धरा, शौर्य
दाखवा. २९ अबशालोमाच्या आज्ञेप्रमाणें त्याच्या
चाकरांनीं अम्नोनाचें केलें. तेव्हां सर्व राजकुमार उठून
आपआपल्या खेचरांवर बसून पळून गेले. ३० ते वाट
चालत असतां दाविदास अशी खबर आली कीं
अबशालोमानें सर्व राजकुमार मारून टाकिले, त्यांतला
एकहि उरला नाहीं. ३१ हें ऐकून दाविदानें उठून
आपलीं वस्त्रें फाडिलीं व जमिनीवर अंग टाकिलें;
त्याचे सर्व सेवकहि आपलीं वस्त्रें फाडून त्याजपाशीं
उभे राहिले. ३२ तेव्हां दाविदाचा भाऊ शिमा याचा
पुत्र योनादाब म्हणाला, माझे स्वामी, सर्व राजपुत्र
मरण पावले अशी कल्पना महाराजांनीं मनांत आणूं नये;
केवळ अम्नोनाचा वध झाला आहे. कारण ज्या
दिवशीं त्यानें अबशालोमाची बहीण तामार भ्रष्ट केली
त्या दिवशीं त्याच्या संकल्पानें ही गोष्ट निश्चित झाली

होती. ३३ तर आतां, अहो माझे स्वामीराज, सर्व
राजकुमार मरण पावले आहेत असा आपल्या मनाचा
समज करून घेऊन आपण कष्टी होऊं नका; कारण केवळ
अम्नोन मृत्यु पावला आहे. ३४ इकडे अबशालोमानें
पलायन केलें. पहाऱ्यावर असलेल्या तरुण पुरुषानें
वर दृष्टि करून पाहिलें तो मागल्या बाजूस
पहाडाजवळच्या वाटेनें पुष्कळ लोक येत आहेत असें
त्यास दिसलें. ३५ तेव्हां योनादाब राजास म्हणाला,
पाहा, राजकुमार येत आहेत; आपल्या दासानें सांगितलें
तेंच खरें. ३६ त्याचें बोलणें संपतें न संपतें तों
राजकुमार आले व हेल काढून रडूं लागले; तेव्हां
राजाहि आपल्या सेवकांसह मोठ्यानें रडूं लागला.
३७ अबशालोम पळून गशूरचा राजा तलमय बिन
अम्मीहूर याच्याकडे गेला. दावीद आपल्या पुत्रासाठीं
नित्य विलाप करीत राहिला.

३८ अबशालोम पळून गशुरास गेला; तेथें तो तीन
वर्षें राहिला. ३९ अबशालोमास भेटण्याविषयीं दावीद
राजा फार आतुर झाला; कारण अम्नोन मरून बरेच
दिवस झाल्यामुळें त्याचें चित्त शांत झालें होतें.

१४ १ राजाचें मन अबशालोमाकडे लागलें आहे,
हें सरूवेचा पुत्र यवाब याच्या लक्षांत आलें.
२ तेव्हां यवाबानें तकोवा येथें जासूद पाठवून
एका चतुर स्त्रीस बोलावून आणिलें; तो तिला म्हणाला,
तूं सुतक्याचें मिष करून सुतकाचा पेहराव घाल,
अंगास तेल लावूं नको आणि मृतासाठीं बहुत दिवस
शोक करणारी अशी स्त्री बन; ३ मग राजापाशीं
जाऊन असें असें बोल; यवाबानें तिला काय बोलावयाचें
तें शिकविलें. ४ तकोवा येथील त्या स्त्रीनें राजाकडे
जाऊन त्यास साष्टांग दंडवत घातलें; आणि म्हटलें,
महाराज, माझी दाद लावा. ५ राजानें तिला विचारिलें,
तुला काय झालें? ती म्हणाली, मी खरोखर विधवा
स्त्री आहें. माझा नवरा मरून गेला आहे. ६ आपल्या
दासीचे दोन पुत्र होते ते दोघे मैदानांत झगडत
असतां त्यांस सोडवावयास कोणी नव्हता; तेव्हां एकानें
दुसऱ्यास असा मार दिला कीं तो ठार मेला. ७ आतां
पाहा, माझ्या कुळांतले सर्व लोक आपल्या ह्या दासीवर
उठले आहेत; ते म्हणतात कीं ज्यानें आपल्या भावाचा
प्राणघात केला त्यास आमच्या स्वाधीन कर.
आपल्या भावाचा त्यानें वध केला आहे, म्हणून त्याचा
प्राण त्याच्या भावाच्या प्राणाबद्दल घेऊं, आणि
तुझ्या त्या वारसाचाहि नाश करूं; या प्रकारें
माझा उरलेला निखारा विझवून टाकून माझ्या पतीचें
नांव व संतति भूतलावरून नष्ट करावयास ते पाहत
आहेत. ८ राजा त्या स्त्रीस म्हणाला, तूं आपल्या घरीं
जा, मी तुझ्यासंबंधानें ताकीद देईन. ९ तेव्हां ती
तकोवा येथील स्त्री राजास म्हणाली, अहो माझे स्वामी-
राज, हा दोष मला व माझ्या पितृकुळास लागो,
आणि राजा व त्याची गादी निष्कलंक राहो. १० राजा
म्हणाला, तुला कोणी कांहीं बोललें तर त्यास मजकडे
घेऊन ये, म्हणजे तो पुनः तुला हातहि लावणार नाहीं.
११ ती म्हणाली, महाराजांनीं आपला देव परमेश्वर याचें
स्मरण करावें म्हणजे रक्तपाताचा सूड घेणाऱ्यास आणखी
नासधूस करितां येणार नाहीं, आणि माझ्या पुत्राचा
नाश होणार नाहीं. तो म्हणाला, परमेश्वराच्या
जीविताची शपथ, तुझ्या पुत्राचा एक केसहि भूमीवर
पडावयाचा नाहीं. १२ ती स्त्री म्हणाली, आपल्या दासीस
स्वामीराजापाशीं एक गोष्ट बोलण्याची परवानगी
असावी. तो म्हणाला, बोल. १३ ती स्त्री म्हणाली,
देवाच्या प्रजेचें नुकसान करण्याचें आपण हें काय योजिलें?
महाराज आतां जे शब्द बोलले त्यांनींच ते दोषी ठरतात.
कारण महाराज स्वतांच्या हाकून दिलेल्यास माघारीं आणीत
नाहींत. १४ आपणा सर्वांस मरणें आहे; आपण भूमीवर
सांडलेल्या पाण्यासारखे आहों; तें पुनः भरून घेतां येत
नाहीं; देव प्राणहरण करीत नसतो, तर घालवून दिलेला
इसम आपल्यापासून कायमचा घालवून दिला जाऊं नये
अशी योजना करीत असतो. १५ मी आतां आपल्या
स्वामीराजांस विनंति करावयास आलें आहें याचें कारण
हेंच कीं लोकांनीं मला घाबरवून सोडिलें, म्हणून आपल्या
दासीनें विचार केला कीं महाराजाला जाऊन सांगावें
म्हणजे ते आपल्या दासीच्या विनंतीप्रमाणें करतील.

१६ हें ऐकून; जो मनुष्य मला व माझ्या पुत्रास
देवाच्या वतनांतून नाहींसा करावयास पाहत आहे,
त्याच्या हातांतून महाराज आपल्या दासीचा बचाव करतील.
१७ आपल्या दासीनें विचार केला कीं माझ्या स्वामी-
महाराजांच्या शब्दानें मला शांति मिळेल; कारण माझे
स्वामीराजे यांला देवदूताप्रमाणें बऱ्यावाईटाचा निर्णय
करितां येतो; तर आपला देव परमेश्वर आपल्याबरोबर असो.
१८ राजानें तिला उत्तर दिलें, जें कांहीं मी तुला
विचारीत आहें तें मजपासून लपवूं नको. ती स्त्री
म्हणाली, स्वामीराजांनीं बोलावें. १९ राजानें विचारिलें,
या प्रकरणांत यवाबाचा हात आहे कीं नाहीं? त्या स्त्रीनें
उत्तर केलें, माझे स्वामीराज, आपल्या जीविताची
शपथ; जें कांहीं माझे स्वामीराज बोलले आहेत त्या-
पासून कोणास उजवीडावीकडे जातां येत नाहीं; आपला
सेवक यवाब यानेंच मला आज्ञा केली व या सर्व गोष्टी
त्यानेंच आपल्या दासीच्या तोंडीं घातल्या. २० त्या
गोष्टीचें स्वरूप बदलावें म्हणून आपला सेवक यवाब यानें
हें केलें आहे; धनीमहाराज देवदूतासारखे चतुर
आहेत, आणि पृथ्वीवर जें कांहीं होतें तें सर्व त्यांला
कळतें. २१ मग राजानें यवाबास म्हटलें, मला हें
कबूल आहे; तर जाऊन त्या तरुण अबशालोमास
माघारीं घेऊन ये. २२ तेव्हां यवाबानें साष्टांग दंडवत
घालून राजास आशीर्वाद दिला आणि म्हटलें,
माझे स्वामीराज, आपली कृपादृष्टि मजवर आहे
हें आज आपल्या दासास कळलें आहे, कारण महाराजांनीं
आपल्या दासाच्या विनंतीप्रमाणें केलें आहे.
२३ मग यवाब उठून गशुरास गेला व तेथून अब-
शालोमास यरुशलेमास घेऊन आला. २४ तेव्हां
राजा म्हणाला, त्यानें आपल्या घरीं जाऊन राहावें,
माझ्या दर्शनास येऊं नये. त्यावरून अबशालोम
आपल्या घरीं जाऊन राहिला; राजाचें त्याला दर्शन
झालें नाहीं.

२५ सर्व इस्राएलांत सौंदर्याविषयीं प्रशंसनीय असा
अबशालोमासारखा कोणी नव्हता; त्याच्या ठायीं
नखशिखांत कांहीं दोष नव्हता. २६ तो वर्षांतून एकदां
आपलें मस्तक मुंडवीत असे; त्याच्या केसांचा भार
त्याला होत असे म्हणून तो ते कातरीत असे;
आपले केस कातरिल्यावर ते तो तोलून पाही, तेव्हां
ते सरकारी वजनाप्रमाणें दोनशें शेकेल भरत
असत. २७ अबशालोमास तीन पुत्र आणि एक
कन्या झाली, तिचें नांव तामार; ही मुलगी अति
रूपवती होती.

२८ या प्रकारें राजाचें दर्शन घेतल्यावांचून अब-
शालोम दोन वर्षें यरुशलेमांत राहिला. २९ राजाकडे
यवाबास पाठविण्यासाठीं अबशालोमानें त्यास बोलावणें
पाठविलें; पण तो त्याजकडे येईना; त्यानें दुसऱ्यांदा
बोलावणें पाठविलें तरी तो येईना. ३० मग तो
आपल्या चाकरांस म्हणाला, पाहा, यवाबाचें एक शेत
माझ्या जमिनीस लागून आहे व त्यांत जव आले
आहेत; जा, त्याला आग लावा; तेव्हां अबशालोमाच्या
चाकरांनीं त्या शेतास आग लाविली. ३१ मग यवाब
उठून अबशालोमाच्या घरीं गेला व त्यास विचारूं
लागला कीं तुझ्या चाकरांनीं माझ्या शेतास कां आग
लाविली? ३२ अबशालोम यवाबास म्हणाला, मला
गशुराहून कां आणिलें? तेथेंच मी आजवर राहिलों
असतों तर बरें झालें असतें, असा निरोप तुझ्या
हातीं राजास पाठवावा म्हणून मीं तुला येथें ये असें
सांगून पाठविलें होतें; तर आतां मला राजाचें दर्शन
करून दे; मी दोषी असलों तर त्यानें मला मारून
टाकावें. ३३ यवाबानें राजाकडे जाऊन त्यास ही
गोष्ट सांगितली; तेव्हां राजानें अबशालोमास
बोलावणें पाठविलें; त्यानें त्याजकडे येऊन त्यास
साष्टांग दंडवत घातलें आणि राजानें अबशालोमाचें
चुंबन घेतलें.

१५ १ यानंतर असें झालें कीं अबशालोमानें
आपल्यासाठीं रथ, घोडे, व आपल्यापुढें
दौडण्यासाठीं पन्नास मनुष्यें ठेविलीं. २ अबशा-
लोम नित्य पहाटेस उठून वेशीकडे जाणाऱ्या रस्त्यांत
उभा राही आणि कोणी फिर्यादी दाद मागण्यासाठीं
राजाकडे आला म्हणजे त्यास बोलावून तूं कोणत्या

नगराचा आहेस असें विचारी; तेव्हां तो म्हणे,
तुझा दास इस्राएलाच्या अमुक अमुक वंशांतला आहे.
३ तेव्हां अबशालोम त्यास म्हणे, पाहा, तुझें प्रकरण
चांगलें व वाजवी आहे; पण तुझें ऐकून घेण्यासाठीं
राजाच्या वतीनें कोणी मनुष्य नेमिलेला नाहीं. ४ अब-
शालोम त्यास आणखी असें म्हणे, मला या देशांत
न्यायाधीश केलें असतें तर किती बरें झालें असतें?
एखाद्यानें आपला कज्जा किंवा प्रकरण मजकडे आणिलें
असतें तर मीं त्यास न्याय दिला असता. ५ कोणी
त्यास मुजरा करावयास जवळ येई तेव्हां तो आपला
हात पुढें करून त्याला धरून त्याचें चुंबन घेई. ६ इस्रा-
एलांतले जे जे लोक राजाकडे न्याय मागण्यासाठीं
येत त्या सर्वांशीं तो असाच वागे; या प्रकारें अबशा-
लोमानें इस्राएल लोकांचीं मनें हरण केलीं.

७ चार वर्षें संपल्यावर अबशालोम राजास
म्हणाला, मला परवानगी असावी, म्हणजे परमेश्वराला
मीं जो नवस केला आहे तो हेब्रोन येथें जाऊन
फेडीन. ८ मी अरामांतील गशूर येथें राहत होतों
तेव्हां आपल्या दासानें असा नवस केला होता कीं परमे-
श्वरानें मला यरुशलेमांत माघारीं नेलें तर मी परमे-
श्वराप्रीत्यर्थ धर्मकर्म करीन. ९ राजा त्यास म्हणाला,
खुशाल जा. मग तो उठून हेब्रोनास गेला. १० अब-
शालोमानें इस्राएलाच्या सर्व वंशांकडे हेर पाठवून
जाहीर केलें कीं रणशिंगाचा शब्द तुम्ही ऐकाल तेव्हां
असा घोष करा कीं अबशालोम हेब्रोनास राजा झाला
आहे. ११ अबशालोमाच्या सांगण्यावरून त्याजबरोबर
दोनशें पुरुष गेले. ते भोळ्या भावानें गेले; त्यांना
कांहींएक ठाऊक नव्हतें. १२ यज्ञ करीत असतां
अबशालोमानें दाविदाचा मंत्री गिलोनी अहीथोफेल यास त्याचें नगर गिलो येथून बोलावून
आणिलें. बंड वाढत गेलें व अबशालोमाकडे
एकसारखे लोक जमत गेले.

१३ तेव्हां एका जासुदानें येऊन दाविदास
सांगितलें, इस्राएल लोकांचीं मनें अबशालोमाकडे
वळलीं आहेत. १४ हें ऐकून दावीद यरुशलेमांतल्या
आपल्या सर्व सेवकांस म्हणाला, चला, आपण पळून
जाऊं; न गेलों तर अबशालोमाच्या हातांतून कोणी
सुटावयाचा नाहीं, निघून जाण्याची त्वरा करा, नाहीं
तर तो अचानक आपणांस पकडून आपल्यावर अरिष्ट
आणील व शहरावर तरवार चालवील. १५ राजाचे
सेवक त्याला म्हणाले, पाहा स्वामीराज, राजाच्या
मनास येईल त्याप्रमाणें करावयास आपले दास तयार
आहेत. १६ मग राजा निघून गेला व त्याच्यामागून
त्याच्या घरचीं माणसें गेलीं. त्याच्या ज्या दहा स्त्रिया
उपपत्नी होत्या त्यांस घर सांभाळावयास ठेवून तो गेला.
१७ राजा निघाला तेव्हां सर्व लोक त्याच्यामागून
गेले व ते बेथ-मरहाक येथें थांबले. १८ त्याचे सर्व
करेथी, पलेथी व त्याजबरोबर गथहून आलेले सहाशें
गथकर हे त्याजबरोबर चालले. १९ राजा इत्तय गित्ती
यास म्हणाला, तूं आमच्याबरोबर कां येतोस? तूं
आपला परत जाऊन राजाजवळ राहा; तूं तर परका व
हद्दपार केलेला आहेस; तूं आपल्या स्थानीं परत जा;
२० तूं कालचा आलेला माणूस; मी वाट फुटेल
तिकडे जाणार, तर आज तुला आमच्याबरोबर इकडे-
तिकडे दौडवीत कां फिरवावें? तर तूं आपला परत
जा, आणि आपल्या भाऊबंदांसहि परत ने; दया व
सत्य हीं तुझ्यासमागमें राहोत. २१ इत्तयानें राजास
उत्तर केलें, परमेश्वराच्या जीविताची आणि माझ्या
स्वामीराजांच्या जीविताची शपथ; प्राण जावो कीं राहो,
जिकडे माझे महाराज जातील तिकडे आपला सेवकहि
असणार. २२ दावीद इत्तयास म्हणाला, जा, पार
निघून जा. तेव्हां इत्तय गित्ती याचीं सर्व माणसें व
सर्व मुलेंबाळें हीं पार निघून गेलीं. २३ सर्व देशानें
मोठा आकांत केला आणि सर्व लोक पार गेले; राजा
किद्रोन ओहळापलीकडे गेला; सर्व लोकहि पार उतरून
गेले; ते रानाच्या वाटेनें गेले. २४ तेव्हां, पाहा, सादोक
व त्याजबरोबर सर्व लेवी देवाच्या कराराचा कोश
घेऊन आले; त्यांनीं देवाचा कोश खालीं ठेविला आणि
सर्व लोक नगरांतून बाहेर पार निघून जात तोंपर्यंत
अब्याथार वर राहिला. २५ राजा सादोकास म्हणाला,

देवाचा कोश नगरांत परत घेऊन जा; परमेश्वराची
कृपादृष्टि मजवर झाली तर तो मला परत आणील आणि
हा कोश व आपलें मंदिर मला पुनः दाखवील; २६ पण
मी तुजवर आतां प्रसन्न नाहीं असें तो म्हणाल्यास,
पाहा, मी येथें हजर आहें, त्याच्या मर्जीस वाटेल तसें
त्यानें माझें करावें. २७ राजा सादोक याजकास म्हणाला,
तूं द्रष्टा आहेसना? तूं नगरांत सुखरूप परत जा, आणि
तुमच्याबरोबर तुमच्या दोन्ही पुत्रांनीं म्हणजे तुझा
पुत्र अहीमास आणि अब्याथाराचा पुत्र योनाथान
यांनीहि जावें. २८ पाहा, तुम्हांकडून मला कांहीं संदेश
येईपर्यंत मी रानामध्यें घाटानजीक थांबतों. २९ तेव्हां
सादोक व अब्याथार देवाचा कोश परत यरुशलेमास
घेऊन जाऊन तेथें राहिले.

३० दावीद जैतून पर्वताचा चढाव चढून गेला; तो
रडतरडत वर चढून गेला; आपलें मस्तक झाकून तो
अनवाणी चालला; त्याच्याबरोबरचीं सर्व माणसें
आपलीं मस्तकें झाकून रडतरडत वर चढून गेलीं.
३१ कोणीं दाविदास सांगितलें कीं अहीथोफेल हाहि
बंडखोरांस सामील होऊन अबशालोमाबरोबर आहे. हें
ऐकून दावीद म्हणाला, हे परमेश्वरा, अहीथोफेलाची
मसलत फोल कर. ३२ डोंगराच्या माथ्यावर ज्या ठिकाणीं
देवाची आराधना करीत असत तेथें दावीद जाऊन
पोहंचला, तेव्हां हूशय अर्की त्यास भेटावयास आला;
त्याचा अंगरखा फाटलेला होता, व त्याच्या डोक्यांत
धूळ घातलेली होती. ३३ दावीद त्यास म्हणाला, तूं
माझ्याबरोबर आलास तर मला तूं भार मात्र होशील;
३४ तर तूं नगरांत परत जाऊन अबशालोमास म्हण,
महाराज, मी आपला दास होतों; पूर्वीं जशी मीं आपल्या
बापाची नौकरी केली तशी मी आतां आपली नौकरी
करितों; असें केल्यानें तूं माझ्याकरितां अहीथोफेलाची
मसलत निष्फळ करिशील. ३५ तेथें तुजबरोबर सादोक
व अब्याथार याजक हे असणार नाहींत काय? जी
कांहीं बातमी तुला राजमंदिरांतून मिळेल ती तूं
सादोक व अब्याथार याजकांस कळीव. ३६ पाहा,
त्यांच्याबरोबर त्यांचे दोन पुत्र म्हणजे सादोकाचा
पुत्र अहीमास व अब्याथाराचा पुत्र योनाथान
हेहि आहेत; जें कांहीं तुमच्या कानीं पडेल तें त्यांच्या
हस्तें मला सांगून पाठीव. ३७ तेव्हां दाविदाचा मित्र
हूशय नगरांत गेला; अबशालोमहि यरुशलेमांत
दाखल झाला.

१६ १ दावीद डोंगराच्या माथ्यावरून पलीकडे
गेला तेव्हां त्याला मफीबोशेथाचा चाकर सीबा
हा भेटला; खोगीर घातलेलीं दोन गाढवें व
त्यांवर दोनशें भाकरी, खिसमिसांचे शंभर घड,
अंजिरांच्या शंभर ढेपा व द्राक्षारसाचा एक बुधला अशी
सामग्री त्याजजवळ होती. २ राजानें सीबास विचारिलें,
यांचें प्रयोजन काय? सीबा म्हणाला, गाढवं राज-
घराण्यांतल्या लोकांस बसण्यासाठीं; भाकरी आणि अंजीर
तरुण चाकरांस खावयासाठीं; आणि द्राक्षारस रानांत
थकलेल्याभागलेल्यांस पिण्यासाठीं आहे. ३ राजानें पुनः
विचारिलें, तुझ्या धन्याचा पुत्र कोठें आहे? सीबा
राजाला म्हणाला, पाहा, तो यरुशलेमांतच राहिला आहे;
आज इस्राएलवंश मला आपल्या बापाचें राज्य पुनः
देईल असें त्याला वाटत आहे. ४ राजा सीबास
म्हणाला, मफीबोशेथाचें जें कांहीं आहे तें सर्व
तुझेंच आहे. सीबानें म्हटलें, मी प्रणाम करितों; माझे
स्वामीराज, मजवर आपली कृपादृष्टि असावी.

५ दावीद राजा बहूरीम येथें पोहंचला तेव्हां
पाहा, शौलाच्या घराण्यांतील एका कुळांतला एक
मनुष्य आला; त्याचें नांव शिमी बिन गेरा असें होतें;
तो शिव्याशाप देत आला. ६ तो दाविदावर व
सर्व राजसेवकांवर धोंडे फेकूं लागला; सर्व
लोक आणि लढवय्ये त्याच्या उजव्याडाव्या बाजूस
होते. ७ शिमी शिव्याशाप देऊन म्हणाला, अरे खुनी
मनुष्या, अधमा, नीच, चालता हो; ८ ज्या शौलाच्या
जागीं तूं राज्य केलें त्याच्या घराण्याच्या रक्तपाता-
बद्दल परमेश्वरानें तुझें पारिपत्य केलें आहे, आणि
परमेश्वरानें तुझा पुत्र अबशालोम याच्या हातीं राज्य
दिलें आहे; पाहा, तूं रक्तपात करणारा मनुष्य आहेस,
यास्तव तुझ्या दुष्टतेंतच तूं गुरफटला आहेस. ९ सरूवेचा

पुत्र अबीशय राजास म्हणाला, या मेलेल्या कुत्र्यानें
माझ्या स्वामीराजांस शाप द्यावा काय? मला त्याच्यावर
चालून जाण्यास हुकूम द्या, मी त्याचें डोकें मारितों.
१० राजा म्हणाला, सरूवेच्या पुत्रांनों, मला
तुमच्याशीं काय करावयाचें आहे? तो शिव्याशाप देत
आहे; दाविदाला शिव्याशाप दे असें खुद्द परमेश्वरानें
त्याला सांगितलें असल्यास तूं हें कां करितोस असें
म्हणण्याची कोणाची प्राज्ञा आहे? ११ मग
दाविदानें अबीशय व आपले सर्व सेवक यांस सांगि-
तलें, पाहा, प्रत्यक्ष माझा पुत्र, माझ्या पोटचा गोळा
माझा जीव घ्यावयास पाहत आहे, तर हा बन्यामिनी हें
असें करीत आहे यांत काय नवल! त्याच्या वाटेस जाऊं
नका, त्याला शिव्याशाप देऊं द्या. कारण परमेश्वरानेंच
त्याला सांगितलें असेल. १२ मला होत असलेला
उपद्रव कदाचित् परमेश्वर पाहील, आणि या
शिव्याशापांऐवजीं मला चांगला मोबदला देईल.
१३ दावीद आपल्या लोकांसह पुढें मार्गस्थ झाला
आणि शिमी समोरच्या पहाडाच्या कडेनें त्याला शिव्या-
शाप देत, धोंडे मारीत व त्याजवर धूळ उधळीत
चालला. १४ राजा आपल्या बरोबरच्या लोकांसह
आपल्या मुक्कामीं थकूनभागून पोहंचला व तेथें त्यानें
विसावा घेतला.

१५ अबशालोम सर्व इस्राएल लोकांसह यरुश-
लेमास आला व त्याजबरोबर अहीथोफेलहि आला.
१६ दाविदाचा मित्र हूशय अर्की अबशालोमाकडे गेला
तेव्हां तो त्यांस म्हणाला, राजा चिरायु होवो! चिरायु
होवो! १७ अबशालोम त्यास म्हणाला, तुझ्या मित्रावर
अशीच का तुझी प्रीति? तूं आपल्या मित्राबरोबर कां
गेला नाहींस? १८ हूशा अबशालोमास म्हणाला, नाहीं;
परमेश्वरानें, आणि या लोकांनीं व सर्व इस्राएल लोकांनीं
ज्याची निवड केली त्याचा मी आहें, व त्याच्याच
बरोबर मी राहणार. १९ मी नोकरी कोणाची करणार?
त्याच्या पुत्राच्या हुजुरास राहून मीं सेवा करूं नये
काय? जशी मीं तुझ्या बापाच्या हुजुरास राहून सेवा
केली तशीच मी तुझ्या हुजुरास राहून करणार. २० मग
अबशालोम अहीथोफेलास म्हणाला, आतां आपण
काय करावें याची सल्ला दे. २१ अहीथोफेलानें
अबशालोमास म्हटलें, ज्या उपपत्नी तुझा बाप
मंदिराच्या रक्षणास ठेवून गेला आहे त्यांच्यापाशीं जा;
तुझ्या बापाला तुझा वीट आला असें सर्व इस्राएल
लोक ऐकतील तेव्हां तुझ्याबरोबरच्या सर्वांच्या
हातांना जोर येईल. २२ अबशालोमासाठीं राज-
मंदिराच्या धाब्यावर एक तंबू दिला आणि सर्व
इस्राएलांदेखत अबशालोम आपल्या बापाच्या
उपपत्नींपाशीं गेला. २३ त्या काळीं अहीथोफेल जी
मसलत देत असे ती जशी काय देवाजवळ मागित-
लेल्या कौलाप्रमाणें असे; दावीद व अबशालोम या
दोघांना जी मसलत तो देत असे ती अशीच असे.

## १७

१ अहीथोफेल अबशालोमास म्हणाला, मला
परवानगी दे म्हणजे मी बारा हजार पुरुष
निवडून घेऊन रातोरात दाविदाचा पाठलाग
करितों; २ तो थकलेलाभागलेला व कमकुवत असतां
मी त्याजवर छापा घालून त्यास घाबरें करीन; त्याच्या-
बरोबरचे सर्व लोक पळून जातील; आणि मग मी
राजालाच तेवढें मारीन; ३ मी सर्व लोकांस तुजकडे
परत आणीन; ज्याच्यामागें तूं लागला आहेस त्याचा
अंत झाला म्हणजे सर्व लोक तुजकडे फिरलेच म्हणा-
वयाचे; या प्रकारें सर्व लोक स्वस्थचित्त होतील.
४ ही गोष्ट अबशालोमास व इस्राएलाच्या सर्व वडील
जनांस पसंत पडली.

५ मग अबशालोम म्हणाला, हूशय अर्की यालाहि
बोलावून आणा; त्याचें काय म्हणणें आहे तेंहि पाहूं.
६ हूशय आला तेव्हां अबशालोम त्यास म्हणाला, अही-
थोफेल अमुक अमुक मसलत देत आहे; त्याच्या सांगण्या-
प्रमाणें करावें काय? नाहीं तर तूं तरी कांहीं मसलत
सांग. ७ हूशय अबशालोमास म्हणाला, अहीथोफेलानें
या प्रसंगीं तुला जी मसलत दिली आहे ती बरोबर
नाहीं. ८ हूशय आणखी म्हणाला, तूं आपल्या बापास व
त्याजबरोबरच्या पुरुषांस चांगला ओळखितोस; ते वीर
पुरुष आहेत. रानांत एखाद्या अस्वलीचीं पोरें कोणी

नेत्रीं असतां जशी ती चवताळते तसे ते चवताळलेले
आहेत. तुझा बाप मोठा योद्धा आहे; तो कांहीं
आपल्या लोकांबरोबर रात्रीचा राहावयाचा नाहीं.
९ पाहा, तो एकाद्या भुयारांत किंवा दुसऱ्या स्थळीं
लपून राहिला असेल. सुरवातीला कांहीं लोक पडले
तर अबशालोमाच्या पक्षाच्या लोकांचाच वध होत
आहे अशी वार्ता लोकांमध्यें पसरेल; १० म्हणजे जो
धैर्यवान् आहे, ज्याचें हृदय सिंहाच्या सारखें आहे,
अशा पुरुषाचीहि गाळण उडेल; कारण सर्व इस्राएल
लोकांस ठाऊक आहे कीं तुझा बाप लढवय्या असून त्याज-
बरोबरचे लोकहि वीर आहेत. ११ माझी तुला अशी
मसलत आहे कीं दानापासून बैर-शेब्यापर्यंतचे अवघे
इस्राएल लोक, समुद्रकिनाऱ्यावरील रेतीप्रमाणें अगणित
असे एकत्र कर आणि तूं स्वतः युद्ध करावयास जा;
१२ मग तो असेल तेथें त्याजवर आपण एकदम
छापा घालूं आणि जमिनीवर दंव पडतें त्याप्रमाणें
आपण त्याच्यावर जाऊन पडूं म्हणजे त्याचा व
त्याजबरोबरच्या लोकांचा आपण मागमूस राहूं देणार
नाहीं. १३ तो जर एकाद्या नगरांत गेला असला तर
सर्व इस्राएल लोक त्या नगरास दोर लावून ते नदींत
ओढून टाकितील; तेथें एक खडाहि राहावयाचा नाहीं.
१४ अबशालोम व सर्व इस्राएल लोक म्हणाले, अही-
थोफेल याच्या मसलतीपेक्षां हूशय अर्की याची मसलत
बरी दिसते. अहीथोफेलाची चांगली मसलत मोडून
अबशालोमावर अरिष्ट आणावें म्हणून परमेश्वरानें ही
योजना केली होती.

१५ मग हूशयनें सादोक व अब्याथार याजक
यांस सांगितलें कीं अहीथोफेलानें अबशालोमास व
इस्राएलाच्या वडील जनांस अशी मसलत दिली होती,
पण मीं अशी अशी मसलत दिली. १६ तर लवकर
जासूद पाठवून दाविदास सांग कीं आज रात्रीं रानां-
तील पारांपाशीं राहूं नका; कसेंहि करून पार उतरून
जा, नाहीं तर राजा व त्याजबरोबरचे सर्व लोक फस्त
होतील. १७ योनाथान व अहीमास हे एन-रोगेल येथें
राहत होते; ते शहरांत आहेत हें कोणास कळूं नये
म्हणून एक दासी जाऊन त्यास खबर देत असे; त्यांनीं
जाऊन दावीद राजास हें वर्तमान सांगितलें; १८ पण
एका पोरानें त्यांस पाहून अबशालोमास जाऊन सांगि-
तलें; तेव्हां ते त्वरेनें निघून बहूरिमांतील एका
मनुष्याच्या घरीं गेले; त्याच्या चौकांत एक विहीर होती
तींत ते उतरले. १९ तेव्हां एका स्त्रीनें एक चादर
घेऊन विहिरीच्या तोंडावर पसरिली व त्यावर कांहीं
भरडलेलें धान्य पसरलें, त्यामुळें कोणाच्या कांहीं लक्षांत
आलें नाहीं. २० अबशालोमाचे चाकर त्या घरीं त्या
बाईकडे आले; ते तिला म्हणाले, अहीमास व योनाथान
कोठें आहेत? तेव्हां त्या स्त्रीनें त्यांस म्हटलें, ते ओहळा-
च्या पलीकडे गेले आहेत. त्यांनीं पुष्कळ शोध केला,
पण ते सांपडले नाहींत, म्हणून ते परत यरुशलेमास
गेले. २१ ते निघून गेल्यावर ते पुरुष विहिरींतून
बाहेर निघाले; त्यांनीं जाऊन दावीद राजास खबर
दिली. ते दाविदास म्हणाले, उठा, ह्या पार उतरून
लवकर पलीकडे जा; अहीथोफेलानें तुमच्याविरुद्ध
अमुक अमुक मसलत केली आहे. २२ तेव्हां दावीद
व त्याच्याबरोबरचे सर्व लोक यार्देनेपार गेले. सकाळीं
उजाडलें तेव्हां यार्देनेच्या पलीकडे गेला नाहीं असा
कोणीच मागें राहिला नाहीं. २३ आपल्या मसलती-
प्रमाणें काम झालें नाहीं हें अहीथोफेलानें पाहिलें
तेव्हां तो आपल्या गाढवावर खोगीर घालून आपल्या
नगरास आपल्या घरीं गेला, आणि आपल्या घराची
सर्व व्यवस्था लावून त्यानें गळफास घेतला; तो मृत्यु
पावला, व त्याला त्याच्या बापाच्या थडग्यांत पुरिलें.

२४ मग दावीद महनाइमास गेला. इकडे अबशा-
लोम इस्राएल लोकांसह यार्देनेपार गेला. २५ अबशा-
लोमानें यवाबाच्या जागीं अमासा यास सेनापति
नेमिलें. यवाबाची आई सरूवा हिची नाहाश म्हणून एक
बहीण होती; हिच्या अबीगल नांवाच्या कन्येपाशीं
इथ्रा नांवाचा एक इस्राएल पुरुष गेला होता त्याचा
पुत्र हा अमासा होय. २६ इस्राएल लोकांनीं व अब-
शालोमानें गिलाद देशांत तळ दिला.

२७ दावीद महनाइम येथें आला तेव्हां अम्मो-

त्यांच्या राब्बांतला नाहाशाचा पुत्र शोबी व लो-दबारां-
तील अम्मीएलाचा पुत्र माखीर आणि रोगलीम येथील
बर्जिल्लय गिलादी यांनीं २८ दाविदासाठीं व त्याच्या
बरोबरच्या माणसांसाठीं खाटा, भांडींकुंडीं, गहूं, जव,
पीठ, हुरडा, शेंगा, वाटाणे, फुटाणे, २९ मध, लोणी,
मेंढरें व गाईच्या दुधाची पनीर हीं आणिलीं; हे
लोक रानांत असून भुकेले, तान्हेले व श्रांत असतील
असें त्यांना वाटलें.

१८ १ दाविदानें आपल्याबरोबरच्या लोकांची
मोजदाद केली व त्यांच्यावर सहस्रपति व शत-
पति नेमिले. २ मग दाविदानें एक तृतीयांश
लोक यवाबाच्या ताब्यांत दिले, एक तृतीयांश लोक
यवाबाचा भाऊ अबीशय जो सरुवेचा पुत्र होता
त्याच्या, व बाकीचे एक तृतीयांश इत्तय गित्तीच्या
ताब्यांत दिले; व त्यांस युद्धास पाठविलें, आणि
राजानें लोकांस सांगितलें, मीहि अवश्य तुम्हांबरोबर
येतों. ३ लोकांनीं म्हटलें, आपण येऊं नये; कारण आम्ही
पळून गेलों तर त्याचें त्यांस कांहीं वाटणार नाहीं;
आमच्यांतले अर्धे लोक मेले तरी त्यांस कांहीं वाटा-
वयाचें नाहीं; पण आपण तर आमच्यांतल्या दहा
हजारांच्या ठिकाणीं आहां; म्हणून आपण नगरांत राहूनच
आम्हांस कुमक करावी हें उत्तम. ४ राजा त्यांस
म्हणाला, तुम्हांस योग्य वाटतें तसें मी करितों. मग
राजा वेशीच्या बाजूस उभा राहिला, आणि लोक
शंभरशंभर, हजारहजार असे बाहेर निघाले. ५ राजानें
यवाब, अबीशय व इत्तय यांस आज्ञा केली कीं त्या
तरुणाशीं म्हणजे अबशालोमाशीं माझ्यासाठीं
सौम्यतेनें वागा; राजानें अबशालोमाविषयीं आपल्या
सरदारांस जी आज्ञा दिली ती सर्व लोकांनीं ऐकली.
६ या प्रकारें ते लोक इस्राएल लोकांशीं सामना करण्यास
रणांगणीं गेले, आणि एफ्राइमाच्या रानांत लढाईस तोंड
लागलें. ७ तेथें दाविदाच्या सेवकांपुढें इस्राएल लोकांचा
मोड झाला; त्या दिवशीं एवढा संहार झाला कीं वीस
हजार लोक कामास आले. ८ लढाई देशभर चालली;
त्या दिवशीं तरवारीपेक्षां रानामुळेंच पुष्कळ लोकांचा
धुव्वा उडाला. ९ अबशालोमाची दाविदाच्या सेवकांशीं
अकस्मात् गांठ पडली. अबशालोम आपल्या खेचरावर
बसून चालला होता; खेचर एका मोठ्या एला वृक्षाच्या
दाट फांद्यांखालून चाललें असतां अबशालोमाचें डोकें
त्या वृक्षास अडकून तो अधांतरीं लटकत राहिला व तें
खेचर त्याच्याखालून निघून गेलें. १० हें पाहून एका
मनुष्यानें यवाबास सांगितलें कीं अबशालोम एका
झाडाला लटकत असलेला मीं पाहिला. ११ यवाबानें
त्या खबर देणाऱ्या मनुष्यास म्हटलें, तूं त्यास तसें
पाहून तेथल्या तेथें मारून जमिनीवर कां पाडिलें नाहीं?
मीं तुला दहा रुपये व कमरबंद दिला असता. १२ तो
मनुष्य यवाबास म्हणाला, हजार रुपये माझ्या हातावर
ठेविले तरी मी राजकुमारावर हात टाकणार नाहीं;
कारण तुमच्यांतल्या कोणींहि त्या तरुण पुरुषास
म्हणजे अबशालोमास हात लावूं नये अशी आज्ञा
राजानें तुला, अबीशयास व इत्तयास दिली ती
आम्हांस महशूर आहे. १३ मीं हें केलें असतें तर
मीं आपला जीव धोक्यांत घातला असता; तूंहि
माझ्याविरुद्ध झाला असतास, कारण राजापासून
कोणतीच गोष्ट लपत नाहीं. १४ यवाब म्हणाला, तुझ्या
नादीं लागून वेळ घालविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मग
त्यानें हातीं तीन तीर घेऊन एला वृक्षावर जीवंत लटकत
असलेल्या अबशालोमाच्या वक्षस्थलीं ते भोंसकिले.
१५ यवाबाच्या दहा शस्त्रवाहक तरुण पुरुषांनीं त्याच्या-
भोंवतीं जमून त्याजवर प्रहार करून त्यास ठार केलें.
१६ मग यवाबानें रणशिंग फुंकिलें तेव्हां लोक इस्रा-
एलाचा पाठलाग करण्याचें सोडून परतले; कारण
यवाबानें लोकांची गय केली. १७ तेव्हां लोकांनीं
अबशालोमास खालीं काढून वनांतल्या मोठ्या खाड्यांत
टाकिलें व त्याच्यावर धोंड्यांची एक मोठी रास केली;
मग सर्व इस्राएल लोक पळून आपआपल्या डेऱ्यांकडे
गेले. १८ आपलें नांव चालविण्यास कोणी पुत्र नाहीं
हें लक्षांत आणून अबशालोमानें आपल्या हयातींत एक
मनोरा उभारिला होता, तो राजाच्या खोऱ्यांत आहे.
त्या मनोऱ्यास त्यानें आपलें नांव दिलें; आजपर्यंत

त्यास अबशालोमाचा स्मारकस्तंभ म्हणत आले आहेत.
१९ सादोकाचा पुत्र अहीमास म्हणाला कीं परमे-
श्वरानें आपल्या शत्रूंचें पारिपत्य केलें आहे, तर
आतां धावत जाऊन ही खबर राजाला देऊं द्या.
२० यवाब त्यास म्हणाला, आज ही खबर घेऊन जाऊं
नको; दुसऱ्या एखाद्या दिवशीं ती घेऊन जा; पण आज
ती नेऊं नको; कारण राजाचा पुत्र मृत्यु पावला आहे.
२१ नंतर यवाब एका कूशी मनुष्यास म्हणाला, तूं जें
कांहीं पाहिलें तें जाऊन राजाला सांग. तेव्हां तो कूशी
यवाबास नमन करून धावत गेला. २२ सादोकाचा पुत्र
अहीमास पुनः यवाबास म्हणाला, कांहीं होवो पण
मलाहि कूशीच्या मागोमाग दौड करूं दे. यवाब
म्हणाला, माझ्या मुला, इनाम मिळण्याजोगी खबर
कांहीं तुजपाशीं नाहीं, तर कां दौड करितोस?
२३ तो म्हणाला, कांहींहि होवो, मला धावत जाऊं दे.
त्यानें त्यास म्हटलें, धाव. तेव्हां अहीमास दौड करून
मैदानाच्या वाटेनें कूशीच्यापुढें निघून गेला.
२४ दावीद वेशीच्या दोन्ही दरवाजांच्या दरम्यान
बसला होता, आणि पहारेकरी वेशीवर चढून तटावर
गेला होता; त्यानें दूर नजर करून पाहिलें तों एक
मनुष्य एकटाच दौडत येत आहे असें त्याच्या दृष्टीस
पडलें. २५ पहारेकऱ्यानें पुकारून राजास तें सांगि-
तलें. तेव्हां राजा म्हणाला, तो एकटाच येत असला
तर तो कांहीं तरी खबर घेऊन येत आहे. इतक्यांत
तो मनुष्य धावत धावत जवळ येऊन पोहंचला.
२६ पहारेकऱ्यानें दुसरा एक मनुष्य धावत येतांना
पाहिला; तेव्हां त्यानें वेसकऱ्यास हाक मारून सांगि-
तलें, पाहा, आणखी एक मनुष्य एकटाच दौडत येत
आहे. राजा म्हणाला, तोहि कांहीं खबर आणीत
असावा. २७ पहारेकरी म्हणाला, पहिल्याची दौड
सादोकाचा पुत्र अहीमास याच्या दौडीसारखी आहे
असें मला वाटतें. राजा म्हणाला, तो भला मनुष्य आहे,
त्यानें कांहीं चांगली खबर आणिली असावी. २८ मग
अहीमासानें येऊन महाराजांचें क्षेम असो असें म्हटलें, आणि
जमिनीपर्यंत लवून राजास मुजरा केला व म्हटलें,
आपला देव परमेश्वर धन्य आहे, त्यानें माझ्या स्वामी-
राजांवर हात उचलणाऱ्या मनुष्यांस आपल्या काबूंत दिलें
आहे. २९ राजानें विचारिलें, तरुण अबशालोम खुशाल
आहे ना! अहीमास म्हणाला, यवाबानें एका सेवकास
व आपला दास जो मी त्यास पाठविलें तेव्हां माझ्या दृष्टीस
मोठी गर्दी पडली, पण काय झालें तें मला कळलें नाहीं.
३० राजा त्यास म्हणाला, बाजूस सरून येथें उभा राहा.
तेव्हां तो बाजूस होऊन तेथें उभा राहिला. ३१ इत-
क्यांत कूशीहि येऊन म्हणाला, स्वामीराजास मीं खबर
आणिली आहे; परमेश्वरानें आज न्याय करून आपल्यावर
उठलेल्या सर्वांच्या हातून आपला बचाव केला आहे.
३२ राजानें कूशीस विचारिलें, तो तरुण अबशालोम
सुखरूप आहेना? कूशी म्हणाला, माझ्या स्वामीराजांचे
शत्रु व जे कोणी आपली हानि करावयास उठतील त्यांचें
त्या तरुणासारखें होवो. ३३ तेव्हां राजा फार गहिव-
रला आणि वेशीवरल्या कोठडींत जाऊन रडला;
जातांजातां त्यानें हे उद्गार काढिले: माझ्या पुत्रा
अबशालोमा! हाय रे हाय! माझ्या पुत्रा! माझ्या पुत्रा
अबशालोमा! तुझ्याबद्दल मी मेलों असतों तर बरें होतें.
हाय रे! अबशालोमा! माझ्या पुत्रा! माझ्या पुत्रा!

१९ १ अबशालोमासाठीं राजा विलाप करीत आहे
असें यवाबाच्या कानीं आलें. २ राजा आपल्या
पुत्रासाठीं दुःख करीत आहे असें लोकांनीं
ऐकल्यामुळें त्या दिवशींचा तो विजय सर्व लोकांस
शोकरूप झाला. ३ युद्धांत पराजित होऊन लज्जेनें
तोंड लपवितात त्याप्रमाणें लोक लपतछपत नगरांत आले.
४ राजा आपलें मुख झाकून मोठा विलाप करून
म्हणाला, हाय रे! माझ्या पुत्रा अबशालोमा! अबशा-
लोमा! माझ्या पुत्रा! माझ्या पुत्रा! ५ यवाब घरांत
राजापाशीं जाऊन म्हणूं लागला, आपल्या सेवकांनीं आज
आपला, आपल्या पुत्रांचा, कन्यांचा, पत्नींचा आणि आपल्या
उपपत्नींचा प्राण वांचविला आहे; त्या आपल्या सेवकांचें
तोंड आपण आज काळें केलें आहे. ६ आपण आपल्या द्वेष्ट्यां-
वर प्रेम करितां आणि आपणावर प्रेम करणाऱ्यांचा द्वेष
करितां. आपण आज असें प्रकट केलें आहे कीं सरदार व

सेवक हे आपणाला कांहींच नव्हत; अबशालोम जीवंत
राहिला असता आणि आम्ही सर्व मेलों असलों तर
आपणाला बरें वाटलें असतें असें मला आज समजून
आलें आहे. ७ तर आतां उठून बाहेर जा आणि
आपल्या सेवकांचें समाधान करा, नाहींतर मी परमे-
श्वराची शपथ घेऊन सांगतों कीं आपण बाहेर न गेलां
तर आज रात्रीं आपणाजवळ एकसुद्धां मनुष्य राहाव-
याचा नाहीं; आणि बाळपणापासून ओढवलें नाहीं
असलें संकट आपणावर ओढवेल. ८ तेव्हां राजा उठून
वेशींत जाऊन बसला. राजा वेशींत बसला आहे हें
सर्व लोकांस कळलें तेव्हां सर्व लोक राजासमोर आले.

इकडे इस्राएल लोक आपल्या डेऱ्यांकडे पळून गेले.
९ इस्राएलाच्या सर्व वंशांतल्या लोकांचा आपसांत वाद
चालला होता; ते म्हणूं लागले कीं राजानें आम्हांस
आमच्या शत्रूंच्या हातांतून सोडविलें, पलिष्ट्यांच्या
हातांतून आमचा बचाव केला; पण आतां तो
अबशालोमाच्या भीतीनें देश सोडून पळून गेला आहे.
१० आपण अबशालोमास राज्याभिषेक केला, पण
तो युद्धांत पडला; तर आतां राजाला परत आणण्या-
विषयीं तुम्ही कांहीं बोलत नाहीं हें काय ?

११ मग दावीद राजानें सादोक व अब्याथार
याजकांस सांगून पाठविलें कीं यहूदी वडील जनांस
सांगा, राजाला मंदिरांत परत न्यावें असें इस्राएल
लोकांचें बोलणें चाललें आहे, हें राजाच्या कानीं
आलें आहे, तर राजास त्याच्या मंदिरांत नेण्याच्या
बाबतींत तुम्ही सर्वांच्या मागें कां राहतां ? १२ तुम्ही
तर माझे भाऊबंद, माझ्या हाडामांसाचे आहां, तर
राजाला परत घेऊन जाण्याच्या कामीं तुम्ही सर्वांच्या
मागें कां ? १३ अमासाला सांगा कीं तूं तर माझ्या
हाडामांसाचा ना ? तूं यवाबाच्या ठिकाणीं कायमचा
सेनापति झाला नाहींस तर देव माझें त्या मानानें व
त्याहूनहि अधिक पारिपत्य करो. १४ या प्रकारें त्यानें
यहूदाच्या लोकांस एकदिल करून त्यांचीं मनें वळ-
विलीं; त्यांनीं राजाकडे सांगून पाठविलें कीं आपण आपले
सर्व सेवक घेऊन माघारीं या. १५ राजा मागें
परतून यार्देनेपर्यंत आला आणि यहूदी यार्देन नदीच्या
अलीकडे राजास घेऊन येण्यासाठीं गिल्गाल येथें
सामोरे गेले.

१६ यहूद्यांबरोबर बहूरीम येथील बन्यामिनी शिमी
बिन गेरा हाहि त्वरा करून दावीद राजास सामोरा
गेला. १७ त्याजबरोबर एक हजार बन्यामिनी पुरुष
होते; त्याप्रमाणेंच शौल घराण्यांतला सेवक सीबा हा
आपले पंधरा पुत्र व वीस चाकर यांस घेऊन
तेथें आला; ते राजापुढें यार्देनेच्या पलीकडे पायीं गेले.
१८ राजाच्या घरचीं माणसें आणण्यासाठीं व त्याला
तिचा वाटेल तसा उपयोग करण्यासाठीं एक नाव तेथें
ठेविली होती. राजा यार्देन उतरून जाण्यास आला
तेव्हां गेराचा पुत्र शिमी त्याच्या पायां पडून म्हणाला,
१९ माझ्या स्वामींनीं माझा अपराध जमेस धरूं नये,
ज्या दिवशीं माझे स्वामीराज यरुशलेम सोडून
निघाले त्या दिवशीं आपल्या दासानें दुष्टपणाचें वर्तन
केलें त्याचें स्मरण करून महाराजांनीं त्याबद्दल विषाद मानूं
नये. २० आपल्या दासानें अपराध केला आहे हें आपला
दास जाणून आहे; म्हणून पाहा, आज माझ्या
स्वामीराजांच्या भेटीस्तव अवघ्या योसेफ घराण्यांतून
मीच पहिला आलों आहें. २१ सरूवेचा पुत्र अबीशय
म्हणाला, शिमीनें परमेश्वराच्या अभिषिक्तास शाप
दिला तर त्याचा वध करूं नये काय ? २२ दावीद
म्हणाला, सरूवेच्या पुत्रांनो, मला तुमच्याशीं काय कर्तव्य
आहे ? कारण आज तुम्ही माझे विरोधी झालां आहां.
इस्राएलांतल्या कोणाचा आज वध करावा काय ? आज
मी इस्राएलाचा राजा आहें हें मला कळत नाहीं काय ?
२३ मग राजा शिमीस म्हणाला, तूं प्राणास मुकणार
नाहींस; राजानें त्याजशीं आणभाक केली.

२४ शौलाचा नातू मफीबोशेथ हा राजाच्या भेटीस
आला; राजा निघून गेला होता तेव्हांपासून ते तो सुख-
रूप घरीं परत येईपर्यंत त्यानें आपले पाय धुतले
नव्हते, आपली दाढी नीटनेटकी केली नव्हती व
वस्त्रेंहि धुतलीं नव्हती. २५ यरुशलेमकर राजाला
भेटाव्यास गेले तेव्हां राजानें विचारिलें, मफीबोशेथा,

तूं मजबरोबर कां आला नाहींस? २६ तो म्हणाला,
माझे स्वामीराज, माझ्या सेवकानें मला फसविलें;
आपला दास पंगु आहे म्हणून आपल्या दासानें विचार
केला कीं मीं आपल्या गाढवावर खोगीर घालून त्यावर
स्वार होऊन महाराजांकडे जावें. २७ माझ्या सेवकानें
माझ्या स्वामीराजांपाशीं माझी चहाडी केली आहे; पण
माझे स्वामीराज देवदूतासारखे आहेत; आतां आपल्या
मर्जीस येईल तसें करा. २८ माझ्या बापाचें सर्व घराणें
आपल्यासमोर मृतवत् होतें, तरी आपण आपल्या दासाची
आपल्या पंक्तीस बसणाऱ्यांमध्यें नेमणूक केली; महाराजां-
जवळ आणखी दाद मागावयाचा मला काय हक्क आहे?
२९ राजा त्यास म्हणाला, तूं आपल्या गोष्टी पुनः कां
काढतोस? माझी आज्ञा आहे कीं तूं व सीबा जमीन
वांटून घ्या. ३० मफीबोशेथ राजास म्हणाला, माझे
स्वामीराज सुखरूप आपल्या मंदिरीं आले आहेत, तर
सीबासच ती सर्व जमीन घेऊं द्या.

३१ मग बर्जिल्लय गिलादी हा रोगलीम येथून आला
आणि राजास यार्देनेपार पोंचविण्यासाठीं त्याजबरोबर
नदी उतरून गेला. ३२ बर्जिल्लय फार वयातीत
होता; त्याचें वय ऐशीं वर्षांचें होतें. राजा महनाइम येथें
तळ देऊन राहिला होता तेव्हां बर्जिल्लयानें त्यास अन्न-
पाणी पुरविलें होतें; तो फार मोठा मनुष्य होता.
३३ राजा बर्जिल्लयास म्हणाला, माझ्याबरोबर चल; मी
तुला यरुशलेमास आपल्याजवळ ठेवून तुझें पालनपोषण
करीन. ३४ बर्जिल्लय राजास म्हणाला, माझ्या आयुष्याचे
आतां किती दिवस उरले आहेत कीं मीं महाराजां-
बरोबर यरुशलेमास जावें? ३५ आज मी ऐशीं वर्षांचा
आहें; या वयांत मला बऱ्यावाइटाचा भेद काय सम-
जणार? आपला दास जें कांहीं खातोपितो त्याचा स्वाद
त्याला कळतो काय! गाणारांचा व गाणारणींचा शब्द
मला ऐकूं येतो काय? तर आपल्या दासानें माझ्या
स्वामीराजांस भार कां व्हावें? ३६ आपला दास राजा-
बरोबर फक्त यार्देनेपार येत आहे; महाराजांनीं याचा एवढा
मोठा मोबदला मला काय म्हणून द्यावा? ३७ आपल्या
दासास परत जाऊं द्या. म्हणजे माझ्या स्वतांच्या गांवीं
माझ्या आईबापांच्या कबरस्तानाजवळ मी मरेन;
पण आपला दास किम्हाम हा हजर आहे. त्याला माझ्या
स्वामीराजांबरोबर पलीकडे जाऊं द्या; मग आपणाला वाटेल
तें त्याचें करा. ३८ राजा म्हणाला, किम्हामानें मज-
बरोबर पलीकडे यावें; तुला बरें वाटेल असें मी त्याचें
करीन; तूं जें कांहीं मला सांगशील तें मी तुजसाठीं
करीन. ३९ मग सारे लोक यार्देनेपलीकडे गेले;
राजाहि पलीकडे गेला; राजानें बर्जिल्लयाचें चुंबन घेऊन
त्याचें अभीष्ट चिंतिलें; आणि तो स्वस्थानीं परत गेला.

४० या प्रकारें राजा नदी उतरून गिल्गालास
गेला; किम्हामहि त्याजबरोबर गेला, यहूदाचे सर्व
लोक व अर्धे इस्राएल लोक राजाला पलीकडे घेऊन
गेले. ४१ तेव्हां सर्व इस्राएल येऊन राजास म्हणूं
लागले, आमचे बांधव यहूदाचे लोक हे आपणाला चोरून
छपवून घेऊन आले; महाराजांला, त्यांच्या परिवाराला व
त्यांच्या सर्व लोकांना यार्देनेपार आणिलें असें कां?
४२ तेव्हां सर्व यहूद्यांनीं इस्राएल लोकांस उत्तर दिलें,
महाराज आमचे जवळचे आप्त आहेत, तर तुम्ही याबद्दल
कां रुसतां? आमच्या खाण्यापिण्याबद्दल महाराजांला कांहीं
खर्च झाला आहे काय! त्यांनीं आम्हांला कांहीं इनाम
दिलें आहे काय? ४३ इस्राएल लोक यहूद्यांस म्हणाले,
महाराजे दहा हिस्सांनीं आमचे आहेत; तुमच्याहून आमचा
दाविदावर जास्त हक्क आहे; तर तुम्ही आम्हांला तुच्छ
समजून आमच्या महाराजांला माघारीं आणण्यापूर्वी
आमचा सल्ला कां घेतला नाहीं? इस्राएल लोकांच्या
भाषणापेक्षां यहूदी लोकांचें भाषण कठोरपणाचें होतें.

२० १ बन्यामिनी बिक्रीचा पुत्र शबा हा
एक अधम मनुष्य होता; त्यानें रणशिंग फुंकून
म्हटलें, दाविदाकडे आमचा कांहीं विभाग
नाहीं; इशायपुत्राकडे आमचा कांहीं वतनभाग नाहीं;
इस्राएलहो, आपआपल्या डेऱ्यांची वाट धरा. २ तेव्हां
सर्व इस्राएल लोक दाविदाला सोडून देऊन बिक्रीचा
पुत्र शबा याच्यामागून गेले; पण यार्देनेपासून यरुश-
लेमापर्यंतचे यहूदी लोक आपल्या राजास धरून राहिले.
३ दावीद यरुशलेम येथें आपल्या मंदिरांत आला

आणि ज्या दहा उपपत्नी राजमंदिराच्या संरक्षणासाठीं
त्यानें ठेविल्या होत्या त्यांस त्यानें अटकेंत ठेवून
त्यांच्या उदरनिर्वाहाची तरतूद केली; पण त्यानें त्यांशीं
समागम केला नाहीं. त्या आमरण वैधव्यदशेंत तशाच
अटकेंत राहिल्या.
४ मग राजा अमासाला म्हणाला, तीन दिवसांच्या
आंत यहूदा वंशाचे लोक जमा कर आणि तूंहि
हजर हो. ५ अमासा यहूदा वंशाच्या लोकांस
बोलावण्यास गेला, पण नेमून दिलेल्या मुदतीबाहेर
त्यास विलंब लागला. ६ तेव्हां दावीद अबीशय यास
म्हणाला, आतां बिक्रीचा पुत्र शबा हा अबशालोमा-
पेक्षांहि आमची अधिक खराबी करणार; तर तूं
आपल्या स्वामीचे लोक बरोबर घेऊन त्याचा पाठलाग
कर, नाहीं तर तो लटबंदी नगराचा आश्रय करून
आमच्या दृष्टीआड लपून राहावयाचा. ७ तेव्हां
यवाबाचे सैनिक, करेथी व पलेथी व सर्व शूर वीर
अबीशयामागून गेले; बिक्रीचा पुत्र शबा याचा पाठलाग
करण्यासाठीं ते यरुशलेमांतून बाहेर पडले. ८ ते
गिबोनांतल्या मोठ्या शिळेपाशीं जाऊन पोहंचले तेव्हां
अमासा त्यांस येऊन भेटला. यवाबानें आपल्या अंगांत
चिलखत घातलें होतें आणि वरून कमरबंद कसलेला
असून म्यानांत घातलेली एक तरवार कमरेस लटका-
विली होती, तिचें म्यान निघून ती खालीं पडली.
९ यवाबानें अमासाला विचारिलें, बंधो, तूं खुशाल
आहेस ना? असें म्हणून यवाबानें चुंबन घेण्याच्या
मिषानें अमासाची दाढी उजव्या हातानें धरिली.
१० यवाबाच्या हातीं असलेल्या तरवारीकडे अमासाचें
लक्ष गेलें नाहीं; त्यानें अमासाच्या पोटांत ती
भोसकून त्याचीं आंतडीं जमिनीवर पाडिलीं; त्यानें
त्याला पुन: वार केला नाहीं; तेवढ्यानेंच त्याचा प्राण
गेला. मग यवाब व त्याचा भाऊ अबीशय यांनीं
बिक्रीचा पुत्र शबा याचा पाठलाग केला. ११ यवाबाच्या
त्या मंडळींपैकीं एक जण अमासापाशीं राहून
म्हणाला, जो कोणी यवाबाच्या पक्षाचा व दाविदास
अनुकूल असेल त्यानें यवाबामागून जावें. १२ अमासा
भर रस्त्यांत रक्तांत लोळत पडला होता. सर्व लोक
स्तब्ध उभे आहेत असें त्या मनुष्यानें पाहिलें तेव्हां
त्यानें अमासाला सडकेवरून काढून एका शेतांत
नेलें; तेथेंहि जो येतो तो स्तब्ध उभा राहतो असें
पाहून त्यानें त्याच्यावर एक वस्त्र टाकिलें. १३ त्यास
सडकेवरून काढून नेल्यावर सर्व लोक बिक्रीचा पुत्र
शबा याचा पाठलाग करण्यासाठीं यवाबाच्या मागून गेले.
१४ नंतर यवाब इस्राएली वंशांच्या लोकांतून जाऊन
आबेल व बेथ-माका येथपर्यंत गेला व बेऱ्यांच्या सर्व
प्रदेशांतून गेला; मग तेहि एकवट होऊन त्याच्या मागून
गेले. १५ मग त्यांनीं बेथ-माकाचें आबेल येथें शबा
यास घेरिलें, आणि नगरासमोर त्यांनीं मोर्चे लाविले;
तो बाहेर कोटाशीं होता. मग यवाबाबरोबरचे सर्व
लोक तट पाडण्यासाठीं त्यावर आघात करूं लागले.
१६ तेव्हां नगरांतून एका शहाण्या बाईनें हाक मारून
म्हटलें, ऐका हो, ऐका; यवाबास सांगा, अमळ जवळ
ये, मला कांहीं तुला सांगावयाचें आहे. १७ तो तिच्या-
जवळ गेला तेव्हां त्या स्त्रीनें विचारिलें, यवाब तो तूंच
काय? तो म्हणाला, होय, मीच तो. मग ती त्यास
म्हणाली, तुझ्या दासीचें म्हणणें ऐक. तो म्हणाला,
सांग, मी ऐकतों. १८ ती म्हणाली, प्राचीन काळीं लोक
म्हणत कीं मसलत विचारावयाची तर ती आबेल
नगरांत विचारावी, व असें केलें म्हणजे झालें.
१९ शांतिप्रिय व विश्वासपात्र अशा इस्राएलांपैकीं मी
आहें; तूं इस्राएलांतल्या एका मातृनगराचा नाश करूं
पाहत आहेस; परमेश्वराचें वतन तूं कां ग्रासूं पाहतोस?
२० यवाब म्हणाला, मीं तें ग्रासून टाकावें अथवा
त्याचा विध्वंस करावा ही गोष्ट मजपासून दूर राहो,
अगदीं दूर राहो. २१ हा प्रकार कांहीं तसा नव्हे;
एफ्राईम डोंगरांतल्या शबा बिन बिक्री नांवाच्या एका
मनुष्यानें दावीद राजावर हात उचलिला आहे; तेवढा
माणूस आमच्या स्वाधीन करा म्हणजे मी नगर सोडून
जाईन. ती स्त्री यवाबास म्हणाली, त्या मनुष्याचें शिर
तटावरून तुजकडे फेकूं. २२ मग त्या स्त्रीनें ही आपली
शहाणपणाची मसलत सर्व लोकांपुढें मांडिली. तेव्हां

त्यांनीं बिक्रीचा पुत्र शबा याचें शिर छेदून यवाबाकडे
फेंकून दिलें. यवाबानें रणशिंग वाजविलें आणि सर्व
लोक नगराजवळून पांगून आपआपल्या डेऱ्यांकडे गेले;
आणि यवाब यरुशलेमास राजाकडे परत गेला.

२३ यवाब इस्राएलाच्या सर्व सैन्यावर होता;
यहोयादाचा पुत्र बनाया हा करेथी व पलेथी यांजवर
होता; २४ अदोराम वेठबिगारीवर होता; अही-
लुदाचा पुत्र यहोशाफाट हा अखबारनवीस होता;
२५ शबा चिटणीस होता; सादोक व अब्याथार
हे याजक होते; २६ आणि याईरी ईरा दाविदाचा
एक मुख्य मंत्री होता.

२१ १ दाविदाच्या कारकीर्दीत लागोपाठ तीन
वर्षे दुष्काळ पडला; तेव्हां दाविदानें परमेश्वरा-
समोर जाऊन प्रश्न केला. परमेश्वरानें उत्तर
दिलें, शौल व त्याचें खुनी घराणें यांच्यामुळें हा
दुष्काळ पडला आहे, कारण त्यानें गिबोनी लोकांचा
संहार केला. २ राजानें गिबोनी लोकांस बोलावून
त्यांशीं बोलणें केलें. (ते गिबोनी लोक इस्राएल लोकां-
पैकीं नसून अवशिष्ट अमोऱ्यांपैकीं होते; इस्राएल
लोकांनीं त्यांच्याशीं शपथ वाहून करार केला होता;
पण इस्राएल लोक व यहूदी लोक यांच्या अभिमाना-
स्तव शौलानें गिबोनी लोकांचा संहार करण्याचा
प्रयत्न केला होता.) ३ दाविदानें गिबोनी लोकांस विचा-
रिलें, तुमच्यासाठीं मी काय करूं? असें कोणत्या प्रकारचें
प्रायश्चित्त मी करूं कीं जेणेंकरून तुम्ही परमेश्वराच्या
वतनाचें अभीष्ट चिंताल? ४ गिबोनी लोक त्यास
म्हणाले, शौल व त्याचें घराणें यांशीं आमचा सोन्या-
रुप्याविषयींची कांहीं गोष्ट नाहीं; तसेंच कोणा इस्राएल
पुरुषास जिवें मारावयाचें आम्हांस प्रयोजन नाहीं. तो
त्यांस म्हणाला, तुम्हीं सांगाल तें मी तुमच्यासाठीं
करीन. ५ ते राजास म्हणाले, ज्या पुरुषानें आमचा नाश
केला आणि आमचा निःपात व्हावा आणि इस्राएल
देशांत आमचें कोणी उरूं देऊं नये असें योजिलें
होतें, ६ त्याच्या वंशांतले सात जण आमच्या हातीं द्या,
म्हणजे परमेश्वरानें निवडिलेल्या शौलाच्या गिब्यांत
परमेश्वराप्रीत्यर्थ आम्ही त्यांस फाशीं देऊं. राजा
म्हणाला, मी त्यांस तुमच्या हातीं देतों. ७ दावीद व
शौलाचा पुत्र योनाथान यांची परमेश्वराच्या नांवानें
आणभाक झाली होती म्हणून शौलाचा नातू योनाथानाचा
पुत्र मफीबोशेथ याची राजानें गय केली; ८ पण
अय्याची कन्या रिस्पा हिला शौलापासून अरमोनी व
मफीबोशेथ असे दोन पुत्र झाले होते ते आणि
शौलाची कन्या मीखल हिला महोलाथी येथील बर्जिल्लय
याचा पुत्र अद्रीएल याच्यापासून पांच पुत्र झाले
होते त्यांस पकडून ९ राजानें गिबोनी लोकांच्या हवालीं
केलें; त्यांनीं त्यांस डोंगरावर परमेश्वरासमोर फाशीं
दिलें. त्या सातांचा एकदम निःपात झाला; त्यांस
ठार मारिलें. ते दिवस हंगामाचे होते, ते जवाच्या
हंगामाचे पहिले दिवस होते. १० मग अय्याची
कन्या रिस्पा ही हंगामाच्या सुरवातीपासून आकाशां-
तून त्या शवांवर पर्जन्यवृष्टि होईपर्यंत त्या खडकावर
गोणपाट पसरून बसली; दिवसा आकाशांतले पक्षी
व रात्रीं वनपशु यांस तिनें त्या शवांस शिवूं दिलें
नाहीं. ११ अय्याची कन्या व शौलाची उपपत्नी जी
रिस्पा हिनें हें असें केलें म्हणून कोणीं दाविदाच्या
कानावर घातलें. १२ तेव्हां दाविदानें जाऊन शौल व
त्याचा पुत्र योनाथान यांच्या अस्थि याबेश-गिलाद
येथल्या लोकांकडून आणिल्या. पलिष्टी लोकांनीं
गिलबोवाच्या डोंगरावर शौलाचा वध केला तेव्हां त्यांनीं
बेथ-शानच्या चवाठ्यावर त्यांस टांगिलें होतें, तेथून
त्यांचीं शवें त्या लोकांनीं चोरून आणिलीं होतीं.
१३ त्यानें तेथून शौल व त्याचा पुत्र योनाथान यांच्या
अस्थि आणिल्या; तसेंच ज्यांस फाशीं दिलें होतें
त्यांच्याहि अस्थि लोकांनीं जमा केल्या. १४ शौल व
त्याचा पुत्र योनाथान यांच्या अस्थि बन्यामीन प्रदेशां-
तील सेला येथें शौलाचा बाप कीश याच्या थडग्यांत
त्यांनीं पुरिल्या; दाविदाच्या आज्ञेप्रमाणें लोकांनीं सर्व कांहीं
केलें. त्यानंतर देशासाठीं केलेली प्रार्थना देवानें ऐकली.

१५ पलिष्ट्यांनीं इस्राएल लोकांशीं पुनः युद्ध केलें;
तेव्हां दावीद आपले सैनिक बरोबर घेऊन पलिष्ट्यांशीं

लढला; त्या प्रसंगीं दावीद थकून गेला. १६ तेव्हां
रेफाई वंशांतला इश्बी-बनोब म्हणून एक इसम होता,
त्याच्या भाल्याच्या फलकाचें वजन तीनशें शेकेल
पितळ भरलें; त्यानें नवी तरवार कमरेस बांधिली
होती; त्यानें दाविदास मारावयाचा बेत केला;
१७ पण सरुवेचा पुत्र अबीशय यानें दाविदाचा बचाव
केला; त्या पलिष्ट्यास त्यानें ठार मारिलें. मग दाविदाच्या
लोकांनीं त्यास शपथ घालून सांगितलें कीं पुनः आपण
आम्हांबरोबर लढाईस येऊं नका; इस्राएलाचा दीप आपण
मालवूं नये.

१८ यानंतर पलिष्ट्यांशीं गोब येथें पुनः युद्ध झालें,
त्या समयीं हूशाथी सिब्बखय यानें रेफाई वंशांतला
सफ यास जिवें मारिलें. १९ गोब येथें पलिष्ट्यांशीं
पुनः युद्ध झालें तेव्हां बेथलहेम येथला यारे-ओरगीम
याचा पुत्र एलहानान यानें गथाच्या गल्याथ याचा
वध केला; त्याच्या भाल्याची काठी साळ्याच्या तुरीएवढी
होती. २० गथ येथें पुनः युद्ध झालें तेव्हां तेथें रेफाई
वंशांतला एक मोठा धिप्पाड पुरुष होता, त्याच्या
प्रत्येक हातास व पायास सहासहा अशीं एकंदर
चोवीस बोटें होतीं. २१ त्यानें इस्राएलाची अवहेलना
केल्यावरून दाविदाचा भाऊ शिमी याचा पुत्र योनाथान
यानें त्याचा वध केला. २२ हे चार पुरुष गथ येथें
रेफाईला झाले होते; ते दाविदाच्या व त्याच्या लोकांच्या
हातानें पडले.

२२ १ परमेश्वरानें दाविदास त्याच्या सर्व शत्रूं-
पासून व शौलाच्या हातांतून सोडविलें त्या
समयीं त्यानें परमेश्वराला हें कवन गाइलें.
२ तो म्हणाला :
परमेश्वर माझा दुर्ग, माझा गड,
मला सोडविणारा, माझाच होय.
३ माझा देव जो माझा दुर्ग, त्याचा आश्रय
मी करितों;
तो माझें कवच, माझें तारणशृंग,
माझा उंच बुरूज, माझें शरणस्थान आहे;
माझ्या उद्धारकर्त्या, घातापासून तूं मला रक्षितोस.
४ स्तुतिपात्र परमेश्वराचा मी धावा करितों,
तेव्हां शत्रूंपासून माझा बचाव होतो.
५ मृत्युतरंगांनीं मला वेष्टिलें,
अधर्माच्या पुरांनीं मला घाबरें केलें.
६ अधोलोकाच्या बंधनांनीं मला घेरलें,
मृत्युपाश मजवर आले.
७ मीं आपल्या संकटांत परमेश्वराचा धावा केला,
माझ्या देवाला मीं हांक मारिली;
त्यानें आपल्या मंदिरांतून माझी वाणी ऐकली,
माझी हाक त्याच्या कानीं गेली.
८ तेव्हां पृथ्वी हालली व कांपली,
आकाशाचे पाये डळमळले,
त्याला झोके बसले, कारण तो संतप्त झाला होता.
९ त्याच्या नाकपुड्यांतून धूर निघत होता,
त्याच्या मुखांतून अग्नि निघून ग्रासीत चालला होता.
त्यामुळें निखारे धगधगत होते.
१० तो आकाश लववून खालीं उतरला;
त्याच्या पायांखालीं निबिड अंधकार होता.
११ तो करूबारूढ होऊन उडाला,
वायूच्या पंखांवर तो दृष्टीस पडला.
१२ त्यानें आपल्याभोंवतीं जलसंचय,
आणि अंतराळांतील अति घन मेघ
यांच्या अंधकाराचे मंडप आपल्यासभोंवार केले.
१३ त्याजपुढील तेजांतून निखारे धगधगत होते.
१४ परमेश्वरानें आकाशांतून गर्जना केली,
परात्पराची वाणी झाली.
१५ त्यानें बाण सोडून त्यांची दाणादाण केली,
विजा पाडून त्यांची त्रेधा उडविली.
१६ तेव्हां परमेश्वराच्या धमकीनें
त्याच्या नाकपुड्यांतील श्वासाच्या सोसाट्यानें
सागरांचे तळ दिसूं लागले,
पृथ्वीचे पाये उघडे पडले.
१७ त्यानें वरून हात लांब करून मला धरलें.

१ अथवा: गल्याथ याच्या भावाचा (१ इतिहास २०:५ पाहा).

आणि मोठ्या जलसंचयांतून मला बाहेर काढिलें.
१८ माझा बलाढ्य वैरी व माझे द्वेष्टे
यांपासून मला त्यानें सोडविलें,
कारण ते मजहून अति बलिष्ठ होते.
१९ माझ्या विपत्काळीं ते मजवर चालून आले;
तेव्हां परमेश्वर माझा आधार झाला.
२० त्यानें मला प्रशस्त स्थळीं बाहेर आणिलें.—
त्याचा प्रसाद मजवर होता म्हणून त्यानें मला
सोडविलें.
२१ परमेश्वरानें माझ्या धार्मिकतेप्रमाणें मला फळ दिलें,
माझ्या हातांच्या निर्मलतेप्रमाणें त्यानें मला
प्रतिफळ दिलें.
२२ कारण मी परमेश्वराचे मार्ग धरून राहिलों,
मीं आपल्या देवाला सोडण्याची दुष्टाई केली नाहीं.
२३ तर त्याचे सर्व निर्णय माझ्या दृष्टीपुढें असत,
मीं त्याच्या नियमांचा त्याग केला नाहीं.
२४ मी त्याच्याशीं निर्दोषतेनें वागत असें,
आणि मीं अधर्मापासून स्वतःला अलिप्त राखिलें.
२५ यास्तव परमेश्वरानें माझ्या धार्मिकतेप्रमाणें,
त्याच्या नजरेस आलेल्या माझ्या निर्मलतेप्रमाणें,
मला प्रतिफळ दिलें.
२६ दयाळू जनाशीं तूं दयेनें वागतोस,
सात्विकाशीं सात्विकतेनें वागतोस;
२७ शुद्ध जनाशीं तूं शुद्ध भावनेनें वागतोस,
कुटिलाशीं तूं कुटिलतेनें वागतोस.
२८ दीन जनांस तूं तारितोस,
उन्मत्त जनांवर दृष्टि ठेवून त्यांचा अधःपात
करितोस.
२९ हे परमेश्वरा, तूं माझा दीप आहेस;
परमेश्वर माझ्या अंधकाराचा प्रकाश करितो.
३० तुझ्या साहाय्यानें मी फौजेवर चाल करून धावतों,
माझ्या देवाच्या साहाय्यानें मीं तट उडून जातों.
३१ देवाविषयीं म्हणाल तर त्याचा मार्ग अव्यंग आहे;
परमेश्वराचें वचन कसास लागलेलें आहे;
त्याचा आश्रय करणाऱ्या सर्वांची तो ढाल आहे.
३२ परमेश्वरापरता देव कोण आहे?
आमच्या देवापरता दुर्ग कोण आहे?
३३ देव माझा अढळ दुर्ग आहे,
सात्विक जनांस तो आपल्या मार्गानें नेतो.
३४ तो माझे पाय हरिणीच्या पायांसारखे करितो,
आणि मला माझ्या उच्च स्थानांवर स्थापितो.
३५ तो माझ्या हातांस युद्धकला शिकवितो
म्हणून माझे भुज पितळी धनुष्य वाकवितात.
३६ तूं मला आपलें तारणरूप कवच दिलें आहे,
तुझ्या लीनतेमुळें मला थोरवी प्राप्त झाली आहे.
३७ तूं माझ्या पावलांसाठीं प्रशस्त जागा केली आहे,
माझे पाय घसरले नाहींत.
३८ मीं आपल्या वैऱ्यांच्या पाठीस लागून त्यांचा
संहार केला,
आणि त्यांचा नायनाट केल्याशिवाय परत फिरलों
नाहीं.
३९ मीं त्यांचा धुव्वा उडविला,
मीं त्यांस इतका मार दिला कीं त्यांस उठतां येईना,
त्यांस मीं पायांखालीं तुडविलें.
४० लढाईकरितां तूं मला सामर्थ्याचा कमरबंद बांधिला,
मजवर उठलेल्यांस तूं माझ्याखालीं चीत केलें.
४१ तूं माझ्या वैऱ्यांस पाठ दाखवावयास लाविलें.
मीं आपल्या द्वेष्ट्यांचा अगदीं संहार केला.
४२ त्यांनीं इकडेतिकडे पाहिलें तरी त्यांस सोडवावयास
कोणी नव्हता;
त्यांनीं परमेश्वराचा धावा केला तरी त्यानें त्यांचें
ऐकलें नाहीं.
४३ तेव्हां भूमीवरल्या धुळीसारखें मीं त्यांचें चूर्ण केलें,
रस्त्यांवरील चिखलाप्रमाणें मीं त्यांस तुडवून दाबून
टाकिलें.
४४ माझ्या प्रजेच्या बखेड्यांपासून तूं मला मुक्त केलें;
मीं राष्ट्रांचा अधिपति व्हावें म्हणून तूं माझें रक्षण
केलें;
जे लोक माझ्या परिचयाचे नव्हते ते माझे अंकित
झाले.

४५ परदेशीय लोकांनीं माझें आर्जव केलें;
माझी कीर्ति त्यांच्या कानीं पडतांच ते मला वश झाले.
४६ परदेशीय लोक गलित झाले;
ते आपल्या कोटांतून कांपत कांपत बाहेर आले.
४७ परमेश्वर जीवंत आहे,
त्या माझ्या दुर्गाचा धन्यवाद होवो;
माझा तारणदुर्ग जो देव त्याचा महिमा वाढो;
४८ त्याच देवानें मला सूड उगवूं दिला,
अन्य राष्ट्रांस माझ्या सत्तेखालीं आणिलें.
४९ तोच मला माझ्या वैऱ्यांपासून सोडवितो,
मजविरुद्ध उठणाऱ्यांवर तूं माझें वर्चस्व करितोस,
बलात्कारी मनुष्यापासून मला सोडवितोस.
५० यास्तव हे परमेश्वरा, मी राष्ट्रांमध्यें तुझी स्तुति करीन,
तुझ्या नामाचीं स्तोत्रें गाईन.
५१ तो आपल्या राजाचा मोठा उद्धार करितो,
आपल्या अभिषिक्ताला,
दाविदाला व त्याच्या संततीला,
सर्वकाळ वात्सल्य दाखवितो.

२३ १ दाविदाचीं शेवटलीं वचनें हीं होत.
ज्यास उच्चपदावर चढविलें,
जो याकोबाच्या देवाचा अभिषिक्त,
जो इस्राएलांचा मधुर स्तोत्र गाणारा
तो इशायाचा पुत्र दावीद असें म्हणतो:
२ परमेश्वराचा आत्मा माझ्या द्वारें म्हणाला,
त्याचें वचन माझ्या जिव्हेवर आलें.
३ इस्राएलांचा देव म्हणाला,
इस्राएलाचा दुर्ग मला म्हणाला,
मानवांवर न्यायानें राज्य करणारा,
देवाचें भय धरून त्यांजवर राज्य करणारा
निर्माण होईल.
४ सूर्योदयींच्या प्रभातेसारखा तो उदय पावेल,
निरभ्र प्रभातेसारखा तो असेल,
पर्जन्यवृष्टीनंतर सूर्यप्रकाशानें जमिनींतून हिरवळ
उगवते तसा तो उगवेल.
५ माझ्या घराण्याचा देवाशीं असा संबंध नाहीं काय?
कारण त्यानें मजशीं निरंतरचा करार केला आहे;
तो सर्व प्रकारें यथास्थित व निश्चित आहे;
माझा संपूर्ण उद्धार व अभीष्ट यांचा तो उदय होऊं
देणार नाहीं काय?
६ सर्व अधर्मी लोकांस कांट्यांप्रमाणें टाकून देतील,
कारण त्यांस हातीं धरितां येत नाहीं;
७ जो कोणी त्यांस धरूं पाहील
त्यास लोखंड व भाल्याचा दांडा घेतला पाहिजे;
तीं आग लागून जागच्या जागीं भस्म होतील.
८ दाविदाच्या पदरीं असलेल्या शूर वीरांचीं नांवें हीं:
तखमोनचा योशेब-बश्शेबेथ, हा सरदारांचा नायक
होता; हाच असनी आदीणो; यानें भाला चालवून
एका प्रसंगीं आठशें मनुष्यें मारिलीं. ९ त्याच्या
खालोखाल एलाजार बिन दोदय बिन अहोही हा
होता; दाविदाबरोबरच्या तिघां महावीरांपैकीं हा एक
होता; युद्धासाठीं जमा झालेल्या पलिष्ट्यांस तुच्छ
लेखून इस्राएल लोक त्यांच्यावर चालून गेले; १० तेव्हां
आपला हात थकून तरवारीस चिकटून जाई तोंवर
एलाजार पलिष्ट्यांस मार देत राहिला. त्या दिवशीं
परमेश्वरानें मोठा विजय घडवून आणिला; त्याच्यामागून
लोक गेले ते केवळ लुटालूट करावयाला. ११ त्याच्या
खालोखाल आगे हरारी याचा पुत्र शम्मा हा होता.
पलिष्ट्यांनीं एकत्र होऊन एका मसुरीच्या शेतांत सैन्यव्यूह
रचिला तेव्हां लोक पलिष्ट्यांसमोरून पळून गेले. १२ त्या
शेताच्या मध्यभागीं उभें राहून शम्मानें त्या शेताचें
रक्षण केलें व त्या पलिष्ट्यांचा वध केला; त्या प्रसंगीं
परमेश्वरानें मोठा विजय घडवून आणला. १३ तीस मुख्य
सरदारांतले तिघे जण हंगामाच्या वेळीं अदुल्लाम गुहेंत
दाविदाकडे आले; तेव्हां पलिष्ट्यांचें सैन्य रेफाईम
खोऱ्यांत तळ देऊन होतें. १४ त्या प्रसंगीं दावीद
गडावर असून बेथलेहेमांत पलिष्ट्यांचें ठाणें बसलें होतें.
१५ दाविदास उत्कट इच्छा होऊन तो म्हणाला, बेथल-
हेमाच्या वेशीजवळील विहिरीचें पाणी मला कोणी
पाजील तर बरें. १६ त्या तिघां वीरांनीं पलिष्ट्यांच्या

छावणींत घुसून बेथलहेमाच्या वेशीजवळील विहिरीचें
पाणी काढून दाविदाकडे आणिलें; पण तो तें पिईना.
त्यानें तें परमेश्वराच्या नामानें ओतिलें. १७ तो म्हणाला,
हे परमेश्वरा, असें कृत्य माझ्याकडून न घडो; जे
आपल्या प्राणांवर उदार झाले त्यांचें हें रक्त मीं प्यावें
काय ? यास्तव तो तें पिईना; त्या तीन वीरांनीं हें कृत्य
केलें. १८ सरूवेचा पुत्र यवाबाचा भाऊ अबीशय हा
तिघांचा प्रमुख होता, त्यानें आपला भाला तीनशें
मनुष्यांवर चालवून त्यांस ठार केलें; त्या तिघांमध्यें
त्यानें नांव मिळविलें. १९ त्या तिघांहून त्याची महती
अधिक होती म्हणून तो त्यांचा नायक झाला ना ? तरी
त्या पहिल्या तिघांच्या योग्यतेस तो पोहंचला नाहीं.
२० कब्सेल येथला एक मनुष्य होता; त्यानें पुष्कळ परा-
क्रम केले होते; त्याच्या यहोयादा नामक पुत्राचा बनाया
म्हणून एक पुत्र होता, त्यानें मवाबी अरीएल याच्या
दोघां पुत्रांस ठार मारिलें; आणि बर्फाच्या दिवसांत
कुपांत उतरून एका सिंहास ठार केलें. २१ त्यानें एका
धिप्पाड मिसरी पुरुषास ठार मारिलें; त्या मिसऱ्याच्या
हातीं भाला होता, पण बनाया केवळ एक काठी घेऊन
त्याच्यावर चालून गेला; व त्यानें त्या मिसऱ्याच्या
हातचा भाला हिसकावून घेऊन त्याच भाल्यानें
त्याचा वध केला. २२ असें करून यहोयादाचा पुत्र
बनाया यानें त्या तिघां वीरांमध्यें नांव मिळविलें.
२३ त्या तिघांहून त्याची महती मोठी होती तरी
पहिल्या तिघांच्या योग्यतेस तो पोहंचला नाहीं.
दाविदानें त्यास आपल्या हुजरातीवर नेमिलें.

२४ यवाबाचा भाऊ असाएल ह्या तिसांपैकीं होता;
बेथलहेमच्या दोदोचा पुत्र एलहानान, २५ शम्मा हरोदी,
अलीका हरोदी; २६ हेलस पल्ती, इक्केश तकोइ याचा
पुत्र ईरा, २७ अबीयेजेर अनाथोथी, मबुन्नय हूशाथी,
२८ सलमोन अहोही, महरय नटोफाथी, २९ बाना
नटोफाथी याचा पुत्र हेलेब, बन्यामिन्यांच्या गिबांतला
रीबय याचा पुत्र इत्तय, ३० बनाया पिराथोनी,
गाशाच्या ओढ्यांजवळचा हिद्दय, ३१ अबी-अल्बोन,
अर्बाथी, अजमावेथ बरहूमी, ३२ अलीहबा
शालबोनी, याशेनाच्या पुत्रांतील योनाथान, ३३ शम्मा
हरारी; शारार अरारी याचा पुत्र अहीयाम, ३४ माका-
थीचा पुत्र अहसबय याचा पुत्र अलीफलेट, अही-
थोफेल गिलोनी याचा पुत्र अलीयम, ३५ हेस्री
कर्मेली, पारय अर्बी, ३६ सोबांतील नाथान याचा
पुत्र इगाल, बानी गादी, ३७ सेलक अम्मोनी, सरूवेचा
पुत्र यवाब याचा शस्त्रवाहक नहरय बैरोथी, ३८ ईरा
इथ्री, गारेब इथ्री, ३९ उरीया हित्ती, मिळून एकंदर
सदतीस.

२४ १ परमेश्वराचा कोप इस्राएलावर पुनरपि
झाला, आणि इस्राएल व यहूदा यांची गणती
करण्याची प्रेरणा देवानें त्यांच्याविरुद्ध दाविदास
केली. २ त्या वेळीं राजाबरोबर सेनापति यवाब
होता; त्यास त्यानें सांगितलें कीं दानापासून बैर-
शेब्यापर्यंतच्या सर्व इस्राएल वंशांमध्यें फिरून तुम्ही
लोकांची मोजदाद करा म्हणजे त्यांची संख्या मला
कळेल. ३ यवाब राजास म्हणाला, आपले लोक कितीहि
असोत, आपला देव परमेश्वर त्यांस शतगुणित करो
आणि माझे स्वामीराजे आपल्या डोळ्यांनीं तें पाहोत;
पण माझ्या स्वामीराजांस ही हौस कां वाटावी ? ४ तथापि
राजाच्या म्हणण्यापुढें यवाब व सैन्याचे सरदार यांचें
कांहीं चालेना; आणि यवाब व सैन्याचे सरदार
राजापुढून इस्राएल प्रजेची मोजदाद करण्यास निघून
गेले. ५ त्यांनीं यार्देनेपलीकडे जाऊन गादांतील
खोऱ्याच्या मध्यभागीं असलेल्या अरोएर नगराच्या
दक्षिणेस डेरे दिले; तेथून ते याजेराकडे गेले. ६ मग
ते गिलाद व तहतीम होदशी या प्रदेशांत गेले; पुढें
दान्यान येथें गेले; तेथून वळसा घेऊन ते सीदोनास गेले.
७ नंतर ते सोर नांवाचा दुर्ग आणि हिव्वी व कनानी
यांचीं सर्व नगरें येथें गेले. तेथून यहूदा देशाच्या
दक्षिण दिशेस बर-शेबा येथवर गेले. ८ देशभर चहूं-
कडे फिरून नऊ महिने वीस दिवसांच्या अंतीं यरुश-
लेमास आले. ९ तेव्हां यवाबानें प्रजेच्या मोजदादीची
यादी राजास दिली; धारकरी योद्धे इस्राएलांत आठ
लक्ष व यहूदांत पांच लक्ष भरले.

१० प्रजेची मोजदाद केल्यावर दाविदाचें मन
त्याला खाऊं लागलें. दावीद परमेश्वरास म्हणाला, हें
जें मीं केलें त्यांत मीं मोठें पाप केलें आहे; तर हे
परमेश्वरा, आपल्या सेवकास दोषमुक्त कर, कारण मीं
मोठा मूर्खपणा केला आहे. ११ दावीद पहाटेस उठला
तेव्हां त्याचा द्रष्टा जो गाद नांवाचा संदेष्टा त्यास
परमेश्वराचें वचन प्राप्त झालें कीं १२ जा, दाविदास
सांग, परमेश्वर म्हणतो, मी तुझ्यापुढें तीन गोष्टी
ठेवितों, त्यांपैकीं कोणती तुजसाठीं करूं ती सांग.
१३ तेव्हां गादानें दाविदाकडे जाऊन त्यास हें
सांगितलें; त्यानें त्यास विचारिलें, तुझ्या देशीं सात
वर्षें दुष्काळ पडावा, किंवा तीन महिने तुझे शत्रु तुझा
पाठलाग करीत असतां तूं त्यांच्यापुढें पळत राहावें,
किंवा तुझ्या देशांत तीन दिवस मरी यावी ? याचा
चांगला विचार कर; ज्यानें मला पाठविलें त्याला मी
काय उत्तर देऊं तें पाहा. १४ दावीद गादास
म्हणाला, मी मोठ्या पेचांत पडलों आहें; परमेश्वराच्या
हातीं आपण पडूं या, कारण त्याचें वात्सल्य
मोठें आहे; मनुष्याच्या हातांत मीं पडूं नये. १५ मग
परमेश्वरानें इस्राएलांत सकाळपासून नेमिलेल्या मुदती-
पर्यंत मरी पाठविली; आणि दानापासून बैर-शेब्या-
पर्यंतच्या लोकांपैकीं सत्तर हजार लोक मेले; १६ पण
देवदूतानें यरुशलेमाचा नाश करण्यासाठीं त्यावर आपला
हात उगारिला तेव्हां परमेश्वराला त्या अरिष्टाविषयीं
वाईट वाटलें, व त्यानें लोकांचा नाश करणाऱ्या
देवदूतास म्हटलें, आतां पुरें कर, आपला हात आटोप;
त्या समयीं परमेश्वराचा दूत अरवना यबूसी याच्या
खळ्यानजीक होता. १७ लोकांचा नाश करणारा देवदूत
दाविदाच्या दृष्टीस पडला तेव्हां त्यानें परमेश्वरास
म्हटलें, पाहा, मीं पाप केलें, मीं दुर्मार्गानेंहि चाललों,
पण या मेंढरांनीं काय केलें ? तुझा हात माझ्या व
माझ्या पितृकुळावर पडावा.

१८ त्या दिवशीं गाद दाविदाकडे येऊन त्यास
म्हणाला, वरतीं जाऊन अरवना यबूसी याच्या
खळ्यांत परमेश्वराप्रीत्यर्थ एक वेदी बांध. १९ तेव्हां
परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें गादानें सांगितलें तें
मान्य करून दावीद वरतीं गेला. २० तेव्हां अरवना खालीं
नजर करून पाहतो तों दावीद आपल्या सेवकांसह
आपल्याकडे येत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें,
आणि त्यानें बाहेर येऊन राजापुढें भूमीपर्यंत लवून
प्रणाम केला. २१ अरवना म्हणाला, माझ्या स्वामी-
राजांचें आपल्या दासाकडे येणें कां झालें आहे ?
दावीद म्हणाला, तुझ्यापासून हें खळें विकत घेण्यास
मी आलों आहें; लोकांवरली ही मरी दूर व्हावी
म्हणून येथें परमेश्वराप्रीत्यर्थ मला एक वेदी बांधाव-
याची आहे. २२ अरवना दाविदास म्हणाला, माझ्या
स्वामीराजांस जें कांहीं वाटेल तें घेऊन त्यांनीं अर्पण करावें;
पाहा, होमबलीसाठीं हे बैल आहेत आणि इंधनांसाठीं
मळणीचीं आउतें व बैलांचें सामान हीं आहेत; २३ व
महाराज, अरवना हें सर्व महाराजाला देत आहे. अरवना
राजास म्हणाला, आपला देव परमेश्वर आपल्याला प्रसन्न
होवो. २४ राजा अरवनास म्हणाला, नाहीं नाहीं, या
वस्तु तुझ्यापासून मी दाम देऊनच घेईन; मी आपला
देव परमेश्वर यास फुकटचे होमबलि अर्पिणार नाहीं.
मग दाविदानें पन्नास शेकेल चांदी देऊन तें खळें व
बैल विकत घेतले. २५ दाविदानें तेथें परमेश्वरा-
प्रीत्यर्थ वेदी बांधून होमबलि व शांत्यर्पणें अर्पिलीं.
या प्रकारें देशासाठीं विनवणी केली ती परमेश्वरानें
मान्य केली आणि इस्राएल लोकांपासून त्या मरीचें
निवारण झालें.

# १ राजे



**१** १ दावीद राजा आतां वृद्ध व वयातीत झाला
होता; ते त्याजवर पांघरुणें घालीत तरी त्याला
ऊब येत नसे. २ तेव्हां त्याचे सेवक त्यास
म्हणाले, आमच्या स्वामीराजांसाठीं एकादी तरुण
कुमारी पाहावी; तिनें तैनातीस राहून आमच्या स्वामी-
राजांची शुश्रूषा करावी आणि त्यांस ऊब यावी
म्हणून त्यांच्या उराशीं निजावें. ३ मग त्यांनीं
सर्व इस्राएल देशांत एका सुंदर कुमारीचा शोध केला,
तेव्हां त्यांस शुनेमकरीण अबीशग नांवाची एक कुमारी
आढळली, तिला ते राजाकडे घेऊन आले. ४ ती
तरुणी फार सुंदर होती; ती राजाच्या शुश्रूषेस राहून
त्याची सेवा करूं लागली; पण राजानें तिजशीं समा-
गम केला नाहीं. ५ त्या समयीं हग्गीथेचा पुत्र अदो-
नीया शिरजोर होऊन म्हणाला, मी राजा होणार;
त्यानें रथ, स्वार व आपणापुढें धावण्यासाठीं पन्नास
पुरुष ठेविले. ६ तूं हें काय करितोस असें विचारून
त्याच्या बापानें त्याला जन्मांत कधीं दुखविलें नव्हतें.
तो फार रूपवान् होता; अबशालोमाच्या मागून तो
जन्मला होता. ७ त्यानें सरूवेचा पुत्र यवाब व
अब्याथार याजक यांजशीं बोलणें लाविलें. ते अदो-
नीया याच्या पक्षाचे होऊन त्यास मदत करणारे झाले;
८ पण सादोक याजक, यहोयादाचा पुत्र बनाया,
नाथान संदेष्टा, शिमी, रेई व दाविदाचे शूर वीर हे
अदोनीयाच्या पक्षास मिळाले नाहींत. ९ अदोनी-
यानें एन-रोगेलजवळचा जोहेलेथ खडक येथें मेंढे,
बैल व पुष्ट पशु यांचा यज्ञ केला, आणि आपले
बंधु सर्व राजकुमार व राजाचे सर्व यहूदी सेवक
यांस आमंत्रण केलें; १० पण नाथान संदेष्टा,
बनाया शूर वीर व आपला भाऊ शलमोन यांस
त्यानें आमंत्रण केलें नाहीं. ११ मग शलमोनाची
आई बथशेबा हिला नाथान म्हणाला, आपला स्वामी
दावीद यास नकळत हग्गीथेचा पुत्र अदोनीया हा
राजा होऊन बसला आहे हें तूं ऐकलें नाहीं काय?
१२ तर मी तुला आतां मसलत देतों; तिच्यायोगें तूं
आपला व आपला पुत्र शलमोन याचा प्राण वांचवि-
शील. १३ तूं दावीद राजाकडे जाऊन त्यास विचार:
माझे स्वामीराजे, माझा पुत्र शलमोन हा खात्रीनें
आपल्यामागें राजा होईल आणि आपल्या गादीवर बसेल
अशी आणभाक आपण आपल्या दासीशीं केली आहेना?
तर अदोनीया कसा राजा होऊन बसला आहे?
१४ तूं राजाशीं भाषण करीत आहेस तों मी तुझ्या
मागून आंत येईन व तुझ्या बोलण्यास पुष्टि देईन.
१५ मग बथशेबा खोलींत राजाकडे गेली; राजा फार
वृद्ध झाला होता; त्याची सेवा शुनेमकरीण अबीशग ही
करीत होती. १६ बथशेबेनें राजास लवून मुजरा केला.
त्यानें तिला विचारिलें, तुला काय पाहिजे? १७ तिनें
म्हटलें, माझे स्वामी, आपण आपला देव परमेश्वर
याची आणभाक करून आपल्या दासीस म्हटलें होतें
कीं तुझा पुत्र शलमोन माझ्यामागें राजा होऊन माझ्या
गादीवर खास बसेल; १८ पण आतां अदोनीया
राजा होऊन बसला आहे हें माझ्या स्वामीराजांस
ठाऊक देखील नाहीं. १९ त्यानें विपुल बैल, पुष्ट पशु
व मेंढे यांचा यज्ञ केला आणि सर्व राजकुमार,
अब्याथार याजक व सेनापति यवाब यांस आमंत्रण
केलें, पण आपला दास शलमोन यास त्यानें आमंत्रण केलें
नाहीं. २० माझ्या स्वामीराजानंतर गादीवर कोणीं
बसावें हें आपल्या तोंडून समजावें म्हणून सर्व इस्राएल
लोकांचे डोळे आपल्याकडे लागले आहेत; २१ नाहीं तर
जेव्हां आमचे स्वामीराजे आपल्या पितरांजवळ जाऊन
निजतील तेव्हां मी व माझा पुत्र शलमोन यांस गुन्हेगार

गणितील. २२ ती राजाशीं बोलत असतां नाथान
संदेष्टाहि आंत आला. २३ लोक राजाला म्हणाले, पाहा,
नाथान संदेष्टा आला आहे. त्यानें राजासमोर होऊन त्यास
भूमीपर्यंत लवून मुजरा केला. २४ नाथान म्हणाला,
हे माझ्या स्वामीराजा, अदोनीया माझ्यामागें राजा
होईल व तो माझ्या गादीवर बसेल असें तूं सांगितलें
आहे काय? २५ पाहा, आज त्यानें खालीं जाऊन
पुष्कळ बैल, पुष्ट पशु व मेंढे यांचा यज्ञ केला असून
सर्व राजकुमार, सेनेचे सरदार व अब्याथार याजक
यांसहि आमंत्रण केलें; ते आमच्यासमोर खाऊन-
पिऊन म्हणत आहेत, अदोनीया राजा चिरायु होवो!
२६ पण त्यानें मला तुझ्या सेवकास आणि सादोक
याजक, यहोयादाचा पुत्र बनाया व तुझा सेवक शलमोन
यांस आमंत्रण केलें नाहीं; २७ हें सर्व माझ्या स्वामी-
राजाकडून झालें आहे काय? माझ्या स्वामीराजामागें
गादीवर कोणीं बसावें हें तूं आपल्या दासांस कळविलें
नाहीं. २८ दावीद राजा म्हणाला, बथशेबेस मजकडे
बोलवा. ती राजाच्या हुजुरास येऊन त्याच्यासमोर
उभी राहिली. २९ तेव्हां राजानें आणभाक करून
म्हटलें, ज्यानें आजपर्यंत माझा प्राण सर्व संकटांतून
सोडविला त्या परमेश्वराच्या जीविताची शपथ; ३० मीं
इस्राएलाचा देव परमेश्वर याची शपथ घेऊन तुला
म्हटलें होतें कीं तुझा पुत्र शलमोन माझ्यामागें राजा
होईल व तोच माझ्या जागीं माझ्या गादीवर खास
बसेल; मी आज निश्चयें तसेंच करणार. ३१ तेव्हां
बथशेबेनें भूमीपर्यंत लवून राजास मुजरा करून
म्हटलें, माझे स्वामीराज दावीद चिरकाल वांचोत.
३२ मग दावीद राजानें म्हटलें, सादोक याजक,
नाथान संदेष्टा व यहोयादाचा पुत्र बनाया यांस
मजकडे बोलावून आणा. तेव्हां ते राजासमोर आले.
३३ राजा त्यांस म्हणाला, तुम्ही आपल्या स्वामींचे
सेवक बरोबर घ्या आणि माझा पुत्र शलमोन यास
माझ्या स्वतःच्या खेचरावर बसवून गीहोन येथें घेऊन जा;
३४ तेथें सादोक याजक व नाथान संदेष्टा यांनीं त्यास
अभिषेक करून इस्राएलावर राजा नेमावें, आणि
करणा वाजवून, शलमोन राजा चिरायु होवो, असें
पुकारावें. ३५ मग तुम्ही त्याच्यामागें चालून इकडे
या, व तो येथें येऊन माझ्या सिंहासनावर बसेल;
तोच माझ्या जागीं राजा होईल; इस्राएल व यहूदा
यांचा तो अधिपति व्हावा अशी माझी अनुज्ञा आहे.
३६ यहोयादाचा पुत्र बनाया म्हणाला, आमेन, माझ्या
स्वामीराजांचा देव परमेश्वर याचीहि अशीच अनुज्ञा
असो. ३७ परमेश्वर माझ्या स्वामीराजांच्या बरोबर
राहिला तसाच तो शलमोनांच्या बरोबर राहो, व
त्याच्या गादीचा महिमा माझे स्वामीराजे दावीद
याच्या गादीहून अधिक वाढवो. ३८ तेव्हां सादोक
याजक, नाथान संदेष्टा आणि यहोयादाचा पुत्र
बनाया हे करेथी व पलेथी यांस बरोबर घेऊन खालीं
गेले आणि शलमोनास दावीद राजाच्या खेचरावर
बसवून गीहोन येथें घेऊन गेले. ३९ तेव्हां सादोक
याजकानें सभामंडपांतील तेलानें भरलेलें शिंग घेऊन
शलमोनास अभिषेक केला आणि करणा वाजविला;
तेव्हां शलमोन राजा चिरायु होवो असा लोकांनीं
घोष केला. ४० मग सर्व लोक त्याच्यामागें चालले;
ते वाजंत्रीं वाजवीत होते व आनंदाचा गजर करीत
होते; त्या नादानें पृथ्वी दणाणली. ४१ इकडे अदो-
नीया व त्याचे सर्व आमंत्रित यांचें भोजन आटोपलें
होतें; इतक्यांत त्यांच्या कानीं हा ध्वनि पडला. यवाबानें
रणशिंगाचा शब्द ऐकून म्हटलें, नगरांतल्या कशाच्या
गलबल्याचा हा आवाज असावा? ४२ तो असें बोलत
आहे इतक्यांत अब्याथार याजकाचा पुत्र योनाथान
आला; अदोनीया त्यास म्हणाला, आंत ये, तूं
भला पुरुष आहेस, तूं चांगलें वर्तमान आणिलें असावें.
४३ योनाथानानें अदोनीयास सांगितलें, आपला स्वामी-
राजा दावीद यानें शलमोनास खरोखर राजा केलें आहे;
४४ त्याच्याबरोबर सादोक याजक, नाथान संदेष्टा,
यहोयादाचा पुत्र बनाया, करेथी व पलेथी यांस
राजानें पाठविलें व त्यांनीं शलमोनास राजाच्या खेचरा-
वर बसविलें; ४५ आणि सादोक याजक व नाथान
संदेष्टा यांनीं त्यास गीहोन येथें राज्याभिषेक केला व

ते तेथून एवढा जयघोष करीत वर गेले कीं नगर
अगदीं दणाणून गेलें; तुमच्या कानीं ध्वनि पडला तो
हाच. ४६ शलमोन राजासनावर विराजमान झाला
आहे; ४७ आपला स्वामीराजा दावीद याजकडे
येऊन राजसेवक आशीर्वाद देत आहेत कीं आपला देव
शलमोनाचें नांव आपल्या नांवाहून श्रेष्ठ करो व त्याच्या
गादीचा महिमा आपल्या गादीहून वाढवो. तेव्हां राजानें
पलंगावरून नमन केलें; ४८ राजानें असेंहि म्हटलें
कीं ज्यानें आज प्रत्यक्ष माझ्या डोळ्यांदेखत एकाला
माझ्या गादीवर बसविलें तो इस्राएलाचा देव धन्य!
४९ तेव्हां अदोनीयाचे सगळे पाहुणे घाबरून गेले
आणि वाट सांपडेल तिकडे पळत सुटले.
५० अदोनीयास शलमोनाची दहशत वाटली व तो
जाऊन वेदीचीं शृंगें धरून राहिला. ५१ शलमोनास
कोणीं जाऊन सांगितलें कीं अदोनीयास शलमोन
राजाची दहशत पडली आहे; पाहा, तो वेदीचीं शृंगें
धरून राहिला आहे; तो म्हणत आहे कीं आपल्या
दासास तरवारीनें वधणार नाहीं अशी आणभाक
शलमोनानें आज करावी. ५२ शलमोन म्हणाला, तो
भला मनुष्य आहे असें दिसल्यास त्याचा एक केसहि
जमिनीवर पडणार नाहीं, पण त्याच्या ठायीं दुष्टता दिसून
आली तर तो प्राणास मुकेल. ५३ मग शलमोन
राजानें कांहीं लोक पाठवून त्यास वेदीपासून आणविलें.
त्यानें येऊन शलमोन राजास मुजरा केला; आणि
शलमोन त्यास म्हणाला, तूं आपल्या घरीं जा.

२ १ दाविदाचा अंतकाळ जवळ आला तेव्हां
त्यानें आपला पुत्र शलमोन यास ताकीद देऊन
म्हटलें, २ मी जगाच्या रहाटीप्रमाणें जाणार;
तर तूं हिंमत धर, मर्दुमकी दाखीव. ३ तुझा देव
परमेश्वर यानें तुला जें अनुशासन लावून दिलें आहे
तें पाळ; त्याच्या मार्गांनीं चाल; आणि मोशाच्या
नियमशास्त्रांत लिहिल्याप्रमाणें त्याचे नियम, आज्ञा,
निर्णय व निर्बंध पाळ; म्हणजे जें कांहीं तूं करिशील
त्यांत व जिकडे तूं जाशील तिकडे तुला यशःप्राप्ति
होईल; ४ आणि माझ्यासंबंधानें दिलेलें वचन
परमेश्वर कायम राखील. तें वचन असें कीं जर तुझी संतति
आपल्या मार्गाकडे लक्ष पुरवील व माझ्यासमोर सत्यानें
व जिवेंभावें चालेल तर इस्राएलाच्या गादीवरील तुझ्या
वंशांतला पुरुष खुंटणार नाहीं. ५ सरूवेचा पुत्र
यवाब यानें मजशीं कसें वर्तन केलें हें तुला ठाऊकच
आहे; नेराचा पुत्र अबनेर आणि येथेरचा पुत्र अमासा
हे जे इस्राएलाचे दोन सेनापति त्यांचें त्यानें काय केलें
तें तुला ठाऊकच आहे; त्या दोघांचा त्यानें घात
केला व शांततेच्या समयीं युद्धप्रसंगासारखा रक्तपात
केला; आणि त्यांत त्यानें आपल्या कमरेचा कमरबंद
व आपल्या पायांतलीं पायतणें भिजविलीं. ६ तर
तूं आपल्या अकलेचा उपयोग कर; त्याचे पिकलेले
केस अधोलोकीं शांतीनें उतरूं देऊं नको; ७ पण
गिलादी बार्जिल्लय याच्या पुत्रांवर कृपादृष्टि ठेव, तें
तुझ्या पंक्तीला बसणारांतले असावे; कारण तुझा
भाऊ अबशालोम याजपासून मी पळून जात होतों
तेव्हां त्यानें मजकडे येऊन माझा परामर्ष घेतला.
८ तसेंच तुझ्या पदरीं बन्यामिनी गेराचा पुत्र बाहू-
रीमकर शिमी हा आहे; मी महनाइमास जात होतों
त्या दिवशीं त्यानें मला भारी शिव्याशाप दिले; पण तो
माझ्या भेटीला यार्देनेजवळ आला तेव्हां मीं परमे-
श्वराच्या नामानें त्याजशीं आणभाक केली कीं मी तुजवर
तरवार धरणार नाहीं. ९ तरी तूं त्यास निर्दोष समजूं
नको; तूं सुज्ञ पुरुष आहेस; त्याचें काय करावें हें
तुला समजेलच; त्या पिकलेल्या केसाच्या म्हाताऱ्यास
रक्ताचें स्नान घालून अधोलोकीं पाठीव. १० नंतर दावीद
आपल्या पितरांजवळ जाऊन निजला आणि त्यांस
दावीदपुरींत मूठमाती दिली. ११ दाविदानें इस्राएलावर
चाळीस वर्षें राज्य केलें; सात वर्षें हेब्रोनांत व तेहतीस
वर्षें यरुशलेमांत राज्य केलें.

१२ मग शलमोन आपला बाप दावीद याच्या
गादीवर बसला; त्यानें आपल्या राज्यास चांगली बळ-
कटी आणिली. १३ त्या समयीं हग्गीथेचा पुत्र अदो-
नीया हा शलमोनाची आई बथशेबा हिच्याकडे आला;
तेव्हां ती त्यास म्हणाली, तूं मित्रभावानें आला आहेस

काय? तो म्हणाला, होय, मी मित्रभावानें आलों आहें;
१४ मला तुजशीं कांहीं बोलावयाचें आहे. ती म्हणाली,
बोल. १५ तो म्हणाला, तुला ठाऊक आहेच कीं मला
राज्य मिळालें होतें आणि मीं राज्य करावें म्हणून सर्व
इस्राएल लोकांचे डोळे मजकडे लागले होते, पण आतां
राज्यक्रांति होऊन तें माझ्या बंधूस मिळालें आहे,
कारण परमेश्वराकडून तें त्यास मिळालें आहे. १६ आतां
मी तुजजवळ एक विनंति करीत आहें, तूं मला
विमुख पाठवूं नको. ती म्हणाली, बोल. १७ तो
म्हणाला, शलमोन राजा तुला नाहीं म्हणणार नाहीं;
त्याला सांग कीं मला शुनेमकरीण अबीशग बायको
करून दे. १८ बथशेबा म्हणाली, बरें, मी तुझ्या वतीनें
राजाजवळ बोलेन. १९ बथशेबा अदोनीयाच्या वतीनें
शलमोन राजाकडे बोलावयास गेली. राजा तिचें
स्वागत करण्यासाठीं उठला व तिला दंडवत घालून
आपल्या सिंहासनावर जाऊन बसला; त्यानें आपल्या
आईसाठीं एक आसन मांडावयास सांगितलें व ती
त्याच्या उजवीकडे बसली. २० ती त्यास म्हणाली, मी
तुझ्याजवळ एक लहानशी गोष्ट मागत आहें, ती तूं
मला नाहीं म्हणूं नको. राजा तिला म्हणाला,
आई, माग, मी तुला नाहीं म्हणणार नाहीं. २१ ती
म्हणाली, शुनेमकरीण अबीशग ही तुझा भाऊ अदो-
नीया यास बायको करून दे. २२ शलमोन राजानें
आपल्या आईस उत्तर दिलें, अदोनीयासाठीं तूं शुनेम-
करीण अबीशग हीच तेवढी कां मागतेस! तो माझा
वडील बंधु आहे त्या अर्थी त्याच्यासाठीं किंबहुना
अब्याथार याजक व सरूवेचा पुत्र यवाब यांच्यासाठीं
राज्य देखील माग. २३ शलमोन राजानें परमेश्वराची
शपथ वाहून म्हटलें, अदोनीयानें ही जी मागणी केली
आहे तीमुळें त्यानें आपल्या प्राणावर संकट आणिलें
आहे; तसें न घडलें तर परमेश्वर माझें तसेंच,
किंबहुना त्याहूनहि अधिक अनिष्ट करो. २४ ज्या परमे-
श्वरानें माझी स्थापना केली, माझा बाप दावीद याच्या
गादीवर मला बसविलें आणि आपल्या वचनानुसार
माझें घराणें स्थापिलें, त्या परमेश्वराच्या जीविताची
शपथ, आजच्या आज अदोनीयास देहांत शासन
होईल. २५ शलमोन राजानें यहोयादाचा पुत्र बनाया
यास पाठविलें; त्यानें त्याजवर असा हल्ला केला कीं तो
प्राणास मुकला. २६ अब्याथार याजकास राजा
म्हणाला, तूं अनाथोथ येथें आपल्या शेतवाडींत जाऊन
राहा; तूं मरणदंडास पात्र आहेस तरी मी आज तुला
मारून टाकीत नाहीं, कारण माझा बाप दावीद याच्या-
समक्ष तूं परमेश्वर देवाचा कोश वाहत असस आणि
माझ्या बापाला ज्या ज्या विपत्ति प्राप्त झाल्या त्यांचा
वांटेकरी तूं होत असस. २७ एलीच्या वंशाविषयीं शिलो
येथें परमेश्वर जें वचन बोलला होता तें पूर्ण करावें
म्हणून शलमोनानें अब्याथारास परमेश्वराच्या याजक-
पदावरून काढून टाकिलें. २८ हें वर्तमान यवाबास
जाऊन पोहंचलें; यवाब हा अबशालोमाच्या पक्षाकडे
वळला नव्हता; तरी तो अदोनीयाच्या पक्षाकडे
वळला होता. यवाब हा परमेश्वराच्या मंडपांत
पळून जाऊन वेदीचीं शृंगें धरून राहिला. २९ तो
परमेश्वराच्या मंडपांत पळून जाऊन वेदीजवळ
आहे हें वर्तमान शलमोन राजास कळलें तेव्हां त्यानें
यहोयादाचा पुत्र बनाया यास पाठविलें; तो त्यास
म्हणाला, जा, त्याच्यावर हल्ला कर. ३० बनायानें परमे-
श्वराच्या मंडपानजीक जाऊन त्यास म्हटलें, राजा
म्हणतो, बाहेर निघून ये. तो म्हणाला, नाहीं, मी येथेंच
मरेन. मग बनायानें राजाकडे परत येऊन सांगितलें
कीं यवाबानें मला असें असें उत्तर दिलें. ३१ राजा
त्यास म्हणाला, त्याच्याच म्हणण्याप्रमाणें त्याला मारून
टाक व त्यास मूठमाती दे, म्हणजे यवाबानें विना-
कारण रक्तपात केला आहे या दोषाचें मजवरून व
माझ्या बापाच्या घराण्यावरून तूं निवारण करिशील.
३२ त्यानें केलेला रक्तपात परमेश्वर त्याच्याच शिरीं
उलटवील; त्यानें तर माझा बाप दावीद यास नकळत
आपल्याहून अधिक धार्मिक व भले अशा दोन
पुरुषांवर म्हणजे इस्राएलाचा मुख्य सेनापति नेराचा
पुत्र अबनेर आणि यहूदाचा मुख्य सेनापति येथेरचा
पुत्र अमासा यांजवर तुटून पडून त्यांस तरवारीनें

जिवें मारिलें. ३३ त्यांचा रक्तपात यवाबाच्या शिरीं व
त्याच्या संततीच्या शिरीं उलटून सदोदित राहील;
तथापि दावीद, त्याचा वंश, त्याचें घराणें व त्याची
गादी यांस परमेश्वराकडून सर्वकाळ शांति प्राप्त होईल.
३४ यहोयादाचा पुत्र बनाया यानें जाऊन यवाबावर
हल्ला करून त्यास ठार मारिलें, आणि रानांतील त्याच्या
स्वतांच्या घरीं त्यास मूठमाती दिली. ३५ राजानें त्याच्या
जागीं यहोयादाचा पुत्र बनाया यास मुख्य सेनापति
नेमिलें आणि अब्याथाराच्या जागीं सादोकास याजक
नेमिलें. ३६ राजानें शिमीस बोलावून आणून सांगितलें,
तूं यरुशलेमांत आपल्यासाठीं घर बांधून राहा व नगरा-
बाहेर कोठें जाऊं नको. ३७ ज्या दिवशीं तूं
बाहेर पडून किद्रोन नाल्याच्या पलीकडे जाशील त्या
दिवशीं तूं अवश्य प्राणास मुकशील हें पक्कें समज;
तुझ्या रक्तपाताचा दोष तुझ्याच माथीं येईल.
३८ शिमी राजास म्हणाला, ठीक आहे, माझ्या स्वामी-
राजानें सांगितल्याप्रमाणें आपला दास करील. शिमी हा
बहुत दिवस यरुशलेमांत राहिला; ३९ पण तीन वर्षें
लोटल्यावर शिमीचे दोन दास गथचा राजा अखीश
बिन माका याजकडे पळून गेले; तेव्हां तुझे दास
गथ येथें आहेत अशी कोणीं त्यास खबर दिली.
४० मग शिमी आपल्या गाढवावर खोगीर घालून
आपल्या दासांचा शोध करण्यासाठीं गथास आखीशाकडे
गेला व त्यांस तेथून घेऊन आला. ४१ शिमी
यरुशलेमाहून गथास गेला होता व आतां परत
आला आहे हें वर्तमान शलमोनास सांगण्यांत आलें,
४२ तेव्हां राजानें शिमीस बोलावून आणून म्हटलें,
ज्या दिवशीं तूं येथून निघून कोठेंहि जाशील त्या
दिवशीं तूं अवश्य प्राणास मुकशील हें पक्कें लक्षांत ठेव
असें मीं तुला परमेश्वराची शपथ घालून बजावून
सांगितलें होतें ना? आणि तूं मला असें म्हणाला
होतास ना कीं जें मीं आतां ऐकलें तें ठीक आहे?
४३ तर परमेश्वराची शपथ व मीं तुला दिलेला सक्त
हुकूम हीं तूं कां मानिलीं नाहींत? ४४ राजा शिमीस
म्हणाला, माझा बाप दावीद याशीं जी दुष्टाई तूं केली
ती सर्व तुझ्या जिवाला ठाऊक आहे, तर परमेश्वर
तुझ्या दुष्टाईचें प्रतिफळ तुझ्या शिरीं येईसें करील.
४५ शलमोन राजा समृद्ध होईल व दाविदाचें राज्य
परमेश्वरासमोर निरंतर कायम राहील. ४६ राजानें
यहोयादाचा पुत्र बनाया याला हुकूम केल्यावरून त्यानें
जाऊन त्याच्यावर हल्ला केला आणि तो प्राणास मुकला.
शलमोनाच्या हस्तें राज्याला बळकटी आली.

३ १ शलमोनानें मिसर देशाचा राजा फारो
याशीं सोयरसंबंध केला; त्यानें त्याच्या मुलीशीं
लग्न करून तिला दाविदपुरास आणिलें, आणि
आपलें मंदिर, परमेश्वराचें मंदिर व यरुशलेमाच्या
सभोवतालची तटबंदी बांधून होईपर्यंत त्यानें तिला
तेथेंच ठेविलें. २ हा काळपावेतों परमेश्वराच्या नामा-
साठीं मंदिर बांधिलें नसल्याकारणानें लोकांना उच्चस्थानीं
यज्ञयाग करावे लागत. ३ शलमोन राजाचें परमे-
श्वरावर प्रेम होतें; आपला बाप दावीद यानें अनु-
सरलेल्या नियमांप्रमाणें तो चालत असे; पण तो उच्च-
स्थानीं यज्ञयाग करी व धूप जाळी.

४ राजा गिबोन येथें यज्ञ करावयास गेला; तें
सर्वांत मोठें उच्चस्थान होतें; तेथल्या वेदीवर शल-
मोनानें एक सहस्र होमबलि अर्पिले. ५ गिबोन येथें
परमेश्वरानें रात्रीं स्वप्नांत शलमोनास दर्शन दिलें;
देवानें त्यास म्हटलें, तुला पाहिजे तो वर माग, तो
मी तुला देईन. ६ शलमोन म्हणाला, तुझा सेवक
माझा बाप दावीद याजवर तुझी मोठी दया असे; तो
तुझ्यासमोर तुजशीं सत्यानें, धर्मानें, व सरळ चित्तानें
वागला, तुजजवळ त्याच्याप्रीत्यर्थ दयेचा एवढा
ठेवा होता कीं त्याच्या गादीवर बसावयास त्याला
तूं पुत्र दिला; वस्तुस्थितिहि अशीच आहे. ७ आतां
हे माझ्या देवा परमेश्वरा, तूं आपल्या सेवकास
माझा बाप दावीद याच्या जागीं राजा केलें आहे,
पण मी तर केवळ लहान मूल आहें; चालचलणूक
कशी ठेवावी तें मला कळत नाहीं. ८ तसेंच तूं
निवडिलेल्या लोकांमध्यें तुझा सेवक राहत आहे; त्या
लोकांचा एवढा समुदाय आहे कीं तें असंख्य व

अगणित आहेत; ९ यास्तव आपल्या सेवकास तुझ्या
लोकांचा न्याय करण्यास सावधान चित्त दे म्हणजे
मला बऱ्यावाइटाचा विवेक करितां येईल. एवढ्या
मोठ्या प्रजेचा न्याय करण्यास कोण समर्थ आहे?
१० शलमोनानें हा वर मागितला म्हणून त्याच्या या
भाषणानें प्रभु त्याजवर प्रसन्न झाला. ११ देव त्यास
म्हणाला, तूं असला वर मागितला; दीर्घायुष्य, धन,
आपल्या शत्रूंचा नाश यांपैकीं कांहीं न मागतां तूं न्याय
करण्याची विवेकबुद्धि मागितली; १२ म्हणून मी
तुझ्या म्हणण्याप्रमाणें करितों; मी तुला बुद्धिमान् व
विवेकी चित्त देतों; तुझ्यासारखा पूर्वी कोणी झाला
नाहीं व पुढें होणार नाहीं. १३ एवढेंच नव्हे तर तूं
मागितला नाहीं असा आणखी एक वर तुला देतों;
धन आणि वैभव हीं तुला देतों; तुझ्या सर्व आयुष्यांत
सर्व राजांमध्यें तुजसमान कोणी असणार नाहीं.
१४ तूं आपला बाप दावीद याजप्रमाणें माझ्या
मार्गांनीं चालून माझे नियम व माझ्या आज्ञा पाळिशील
तर मी तुझ्या आयुष्याची वृद्धि करीन. १५ शलमोन
जागा झाला तेव्हां आपणास स्वप्न पडलें असें त्यास
समजलें; मग यरुशलेमास जाऊन त्यानें परमेश्वराच्या
कराराच्या कोशापुढें उभें राहून होमबलि व शांत्यर्पणें
अर्पिलीं व आपल्या सर्व सेवकांस मेजवानी दिली.

१६ त्या दिवसांत दोन वेश्या राजाकडे येऊन त्याच्या-
समोर उभ्या राहिल्या. १७ त्यांतली एक स्त्री म्हणाली,
माझे स्वामी, मी व ही स्त्री अशा आम्ही दोघी
एकाच घरांत राहतों; हिच्याबरोबर राहत असतां मी
प्रसूत होऊन मला मूल झालें; १८ मी प्रसूत झाल्यावर
तिसऱ्या दिवशीं ही स्त्रीदेखील प्रसूत झाली. आम्ही
दोघी एकत्र होतों; आणि आम्हां दोघींशिवाय घरांत
कोणी परकें नव्हतें. १९ रात्रीं या स्त्रीचें बालक हिच्या
अंगाखालीं सांपडून मरण पावलें; २० तेव्हां हिनें
मध्यरात्रीं उठून मी आपली दासी निद्रिस्त असतां
माझा मुलगा माझ्यापासून घेऊन आपल्या उराशीं
निजविला आणि आपलें मेलेलें मूल माझ्या उराशीं
निजविलें. २१ सकाळीं मी बालकास दूध पाजण्यासाठीं
उठून पाहतें तों मूल मेलेलें आढळलें. सकाळ झाल्यावर
मीं लक्षपूर्वक पाहिलें तेव्हां मला झालेला मुलगा हा
नव्हे असें मला दिसून आलें. २२ दुसरी स्त्री म्हणाली,
छे, नाहीं, जीवंत मुलगा माझा आहे व मेलेला तुझा
आहे. पहिली म्हणली, छे, नाहीं, मेला तो तुझा
मुलगा आणि जीवंत तो माझा मुलगा; असें राजापुढें
त्या बोलल्या. २३ राजा बोलला, एक म्हणते, जीवंत
मुलगा माझा आहे व मेलेला तुझा आहे; दुसरी
म्हणते, छे, नाहीं, मेलेला तो तुझा मुलगा
आणि जीवंत तो माझा मुलगा. २४ मग राजा
म्हणाला, मला तरवार आणून द्या; तेव्हां राजाला
तरवार आणून दिली. २५ राजा म्हणाला, या
जीवंत मुलाचे कापून दोन तुकडे करा, अर्धा हिला
द्या आणि अर्धा तिला द्या. २६ तेव्हां ज्या बाईचें तें
जीवंत मूल होतें तिचीं आंतडीं आपल्या मुलग्यासाठीं
तुटून ती राजास म्हणाली, माझे स्वामी, जीवंत
मुलगा तिला द्या पण त्यास मारून टाकूं नका. दुसरी स्त्री
म्हणाली, तो न माझा न तुझा, त्याचे दोन भाग करा.
२७ मग राजानें म्हटलें, हा जीवंत मुलगा पहिलीस
द्या, त्यास मारूं नका, कारण तीच त्याची आई.
२८ राजानें हा न्याय केला तो सर्व इस्राएल लोकांच्या
कानीं गेला, तेव्हां त्यांच्या ठायीं राजाविषयीं पूज्यबुद्धि
उत्पन्न झाली, कारण न्यायइनसाफ करण्याचें दैवी
ज्ञान त्याच्या ठायीं आहे हें त्यांस दिसून आलें.

४ १ शलमोन राजा सर्व इस्राएलाचा राजा
होता. २ त्याचे सरदार हे होते; सादोकाचा पुत्र
अजऱ्या याजक, ३ शिशाचे पुत्र अलिहोरेफ व
अहीया हे चिटणीस, अहीलुदाचा पुत्र यहोशाफाट
बखरनवीस; ४ यहोयादाचा पुत्र बनाया सैन्यावर होता;
सादोक व अब्याथार हे याजक होते. ५ नाथानाचा
पुत्र अजऱ्या कमावीसदारांवर होता; नाथानाचा
पुत्र जाबूद हा प्रधान व राजमित्र होता; ६ अहीशार
हा खानगी कारभारी होता व अब्दाचा पुत्र अदोनीराम
बिगाऱ्यांवर होता; ७ शलमोनाचे बारा कमावीसदार
असत; ते सर्व इस्राएलावर नेमिलेले असून राजास व

त्याच्या घराण्यास अन्नसामग्री पुरवीत; वर्षांतून एकेका
महिन्याचा पुरवठा करण्याचें काम एकेकाकडे असे.
८ त्यांचीं नांवें हीं: एफ्राइमाच्या डोंगरी प्रदेशांत बेन-हूर;
९ माकस, शालबीम, बेथ-शेमेश व एलोन-बेथ-हानान
यांत बेन-देकर; १० अरुबोथांत बेन हेसेद, याच्याकडे
सोखो व हेफेर प्रदेश होते; ११ दोरच्या सर्व पठारांत
बेन-अबीनादाब; शलमोनाची कन्या टाफाथ ही त्याची
स्त्री होती; १२ तानख, मगिद्दो आणि बेथ-शानचा
अवघा प्रदेश म्हणजे सारतानाजवळील इस्रेलाखालचा
बेथ-शानापासून अबेल-महोलापर्यंत आणि यकमामाच्या
पलीकडच्या बाजूपर्यंत असलेला प्रदेश यांत अहीलुदाचा
पुत्र बाना हा होता; १३ रामोथ-गिलादांत बेन-गेबेर
होता; याच्याकडे मनश्शाचा पुत्र याईर याचे गिलादां-
तले गांव होते; याशिवाय आणखी बाशानांतला अर्गोब
प्रांत यांतलीं तटबंदी व पितळेचे अडसर असलेलीं
साठ मोठीं नगरें त्याच्याकडे होतीं; १४ इद्दोचा पुत्र
अहीनादाब महनाइमांत होता; १५ नफतालींत
अहीमास हा होता; त्यानें शलमोनाची कन्या बासमथ
हिच्याशीं विवाह केला होता. १६ आशेर व आलोथ
यांत हुशयाचा पुत्र बाना हा होता; १७ इस्साखारांत
पारूहाचा पुत्र यहोशाफाट हा होता; १८ बन्यामिनांत
एलाचा पुत्र शिमी हा होता; १९ उरीचा पुत्र गेबेर
हा गिलादांत होता; या एवढ्या देशांत तो एकटाच
कमावीसदार होता. अमोऱ्यांचा राजा सिहोन आणि
बाशानाचा राजा ओग यांचा हा देश पूर्वी होता.
२० यहूदा व इस्राएल हे समुद्रकिनाऱ्याच्या वाळूप्रमाणें
संख्येनें बहुत असत; ते खाऊनपिऊन चैनींत असत.

२१ महानदापासून पलिष्टयांच्या देशापर्यंत व मिसर
देशाच्या सरहद्दीपर्यंत सर्व राज्यांवर शलमोनाचें सार्व-
भौमत्व होतें; तेथील लोकांनीं शलमोनाच्या सर्व आयुष्य-
भर त्यास करभार दिला व ते त्याचे अंकित राहिले.
२२ शलमोनास एका दिवसाची भोजनसामग्री लागे ती
येणेंप्रमाणें: तीस कोर मापाचें सपीठ; साठ कोर मापाचें
पीठ; २३ दहा पुष्ट बैल, कुरणांतले वीस बैल, शंभर
मेंढरें, यांखेरीज हरिणें, सांबरें, भेकरें, व आणखी पुष्ट
पक्षी. २४ महानदाच्या अलीकडल्या सर्व देशांवर
म्हणजे तिफसाह येथून गज्जापर्यंतच्या देशांवर जितके
राजे होते त्या सर्वांवर शलमोनाचें प्रभुत्व होतें; आणि
आसपासच्या सर्व देशांच्या लोकांशीं त्याचें सख्य असे.
२५ दानापासून बैर-शेब्यापर्यंत सारे यहूदी व इस्राएल
आपआपली द्राक्षालता व अंजीर वृक्ष ह्यांच्याखालीं
शलमोनाच्या सर्व कारकीर्दीत निर्भय राहत होते.
२६ रथांच्या घोड्यांचीं चाळीस हजार ठाणीं व बारा
हजार स्वार शलमोन बाळगून होता. २७ शलमोन
राजास व त्याच्या पंक्तीस भोजन करणाऱ्यांसाठीं
कमावीसदार त्यांच्या त्यांच्या नेमिलेल्या महिन्यांत
अन्नाचा पुरवठा करीत; कोणत्याहि पदार्थाची वाण ते
पडूं देत नसत. २८ रथांच्या व स्वारीच्या घोड्यांसाठीं
जव व पेंढा लागे तो प्रत्येक कमावीसदार नियमाप्रमाणें
पोंचता करीत असे.

२९ देवानें शलमोनास अलोट शहाणपण व बुद्धि
दिली आणि समुद्रकाठच्या वाळूसारखें विशाळ मन दिलें.
३० शलमोनाचें शहाणपण सर्व पूर्वदेशनिवासी
आणि मिसरी यांच्याहून अधिक होतें. ३१ तो सर्व
मनुष्यांहून, एज्राही एथान, हेमान व माहोलाचे पुत्र
कल्कोल व दर्दा या सर्वांहून शहाणा होता, आणि
त्याची कीर्ति आसपासच्या सर्व राष्ट्रांमध्यें पसरली.
३२ त्यानें तीन हजार नीतिसूत्रें कथिलीं व एक
हजार पांच गीतें रचिलीं. ३३ त्यानें लबानोनावरील
देवदारूपासून तों भिंतींतून उगवणाऱ्या एजोब झाडा-
पर्यंत सर्व उद्भिज्जांचें विवेचन केलें; तसेंच पशु, पक्षी,
रांगणारे जंतु व मासे यांचेंहि त्यानें विवेचन केलें.
३४ पृथ्वीवरील ज्या ज्या राष्ट्रांनीं व ज्या ज्या राजांनीं
शलमोनाच्या शहाणपणाची कीर्ति ऐकली त्यांच्याकडून
लोक त्याचें शहाणपण ऐकावयास येत असत.

१ कांहीं दिवसांनीं सोरचा राजा हीराम यानें
५ आपले सेवक शलमोनाकडे पाठविलें; शलमोनाचा
अभिषेक होऊन तो आपल्या बापाच्या जागीं
गादीवर बसल्याचें वर्तमान त्यानें ऐकलें होतें; हीराम
व दावीद यांची अखंड मैत्री होती. २ शलमोनानें

हिरामास सांगून पाठविलें कीं ३ माझे वडील
दावीद यांचे शत्रु परमेश्वर पादाक्रांत करीपर्यंत
त्यांच्या सभोवार युद्ध चाललें असल्यामुळें त्यांला
आपला देव परमेश्वर याच्या नामासाठीं मंदिर बांधितां
आलें नाहीं हें आपणाला ठाऊक आहे; ४ पण आतां
माझा देव परमेश्वर यानें मला चोहोंकडे स्वास्थ्य दिलें
आहे; कोणी शत्रु अथवा अरिष्ट राहिलें नाहीं.
५ पाहा, मीं आपला देव परमेश्वर याच्या नामासाठीं
मंदिर बांधण्याचें योजिलें आहे; परमेश्वरानें माझे
वडील दावीद यांस म्हटलें होतें कीं तुझ्या जागीं तुझ्या
गादीवर तुझा जो पुत्र मी बसवीन तोच माझ्या
नामासाठीं मंदिर बांधील; त्याप्रमाणें मी करणार आहें.
६ तर आतां मजसाठीं लबानोन पर्वतावरील गंधसरू
कापण्याची आज्ञा द्या; माझे सेवक आपल्या लोकांबरोबर
राहतील; जी कांहीं मजुरी आपण ठरवाल ती मी आपल्या
सेवकांस देईन; आपल्याला हें ठाऊक आहे कीं इमारती लाकडें
कापावयाचें कसब सिदोनी लोकांसारखें आमच्या
लोकांपैकीं कोणांत नाहीं. ७ शलमोनाचा हा निरोप
ऐकून हिरामास फार आनंद झाला व तो म्हणाला,
या थोर राष्ट्रावर राज्य करण्यासाठीं दाविदास असा
शहाणा पुत्र ज्यानें दिला आहे त्या परमेश्वराचा आज
मी धन्यवाद करितों. ८ हिरामानें शलमोनास सांगून
पाठविलें कीं आपण पाठविलेला निरोप मीं ऐकला; गंध-
सरूच्या व देवदारूच्या लाकडांविषयीं जें आपलें सांगणें
आहे त्याप्रमाणें मी करितों. ९ माझे चाकर तीं
लाकडें लबानोनाहून समुद्रापर्यंत नेतील; तेथें त्यांचे
तराफे करून जें ठिकाण आपण मला नेमून द्याल तेथें
जलमार्गानें तीं मी पोंचतीं करीन; तेथें तीं मी सोड-
वून ठेवीन; मग तेथून तीं आपण घेऊन जा; माझ्या
सेवकजनांस अन्नसामग्री पुरविली म्हणजे पुरे.
१० शलमोनास लागलीं तेवढीं गंधसरूचीं व
देवदारूचीं लाकडें हिरामानें पुरविलीं. ११ शलमोनानें
हिरामाच्या सेवकजनांच्या निर्वाहासाठीं वीस हजार कोर
गहूं आणि वीस मापें निर्मळ तेल पुरविलें; हा एवढा
पुरवठा प्रतिवर्षी शलमोन हिरामास करीत असे.
१२ परमेश्वरानें आपल्या वचनानुसार शलमोनास
शहाणपण दिलें; हिराम व शलमोन यांच्यामध्यें सख्य
राहिलें आणि त्या दोघांनीं करारमदार केले.
१३ शलमोन राजानें सर्व इस्राएलांतल्या लोकांवर
बिगार बसविली, ही बिगार तीस हजार मनुष्यांची
होती. १४ लबानोन पर्वतावर दरमहा पाळीपाळीनें
दहा दहा हजार बिगारी त्यानें पाठविले; एक महिना
ते लबानोन पर्वतावर राहत व दोन महिने घरीं
राहत; अदोनीराम हा बिगाऱ्यांवर होता. १५ शल-
मोनाचे सत्तर हजार ओझेकरी आणि पहाडांवर ऐंशीं
हजार पाथरवट होते; १६ शलमोनाच्या कामावरील
मुख्य अमलदारांखेरीज आणखी तीन हजार तीनशें
अमलदार कामकरी लोकांचा बंदोबस्त करावयास
नेमिले होते. १७ मंदिराचा पाया घडींव चिऱ्यांचा
घालावा म्हणून राजाज्ञेनें मोठमोठे व मोलवान् पाषाण
खोदून काढण्यांत आले. १८ शलमोनाचे व हिरामाचे
कारागीर आणि गिबली लोक यांनीं ते घडिले; मंदिर
बांधावयासाठीं लाकडें व चिरे त्यांनीं तयार केले.

६ १ इस्राएल लोक मिसर देशांतून निघाल्यापासून
चारशेंऐंशाव्या वर्षी, इस्राएलावरील शलमोनाच्या
कारकीर्दीच्या चौथ्या वर्षी, दुसऱ्या म्हणजे जिव
नांवाच्या महिन्यांत शलमोनानें परमेश्वराचें मंदिर
बांधण्याची सुरवात केली. २ शलमोनानें परमेश्वरा-
साठीं मंदिर बांधिलें, त्याची लांबी साठ हात, रुंदी
वीस हात व उंची तीस हात होती. ३ मंदिराच्या
पवित्रस्थानापुढील देवडीची लांबी वीस हात म्हणजे
मंदिराच्या रुंदीएवढी होती, आणि मंदिरासमोर तिची
रुंदी दहा हात होती. ४ त्यानें मंदिरास खिडक्या
केल्या त्यास जाळ्या कायम बसविल्या होत्या.
५ आणखी मंदिराच्या भिंतीस लागून सभोवार मजले
केले आणि तसेंच मंदिराचें पवित्रस्थान आणि परम-
पवित्रस्थान यांच्या भिंतीस लागून सभोवार मजले
केले; आणि मंदिराच्या सभोवार कोठड्या केल्या;
६ सर्वांत खालच्या मजल्याची रुंदी पांच हात, मधल्या
मजल्याची सहा हात व वरच्या मजल्याची सात हात

होती; त्यानें मंदिराच्या आसपासच्या भिंतींस बाहेरून
तोडे ठेविले होते, ते अशासाठीं कीं मंदिराच्या भिंतींत
तुळ्या शिरूं नयेत. ७ खाणीपाशींच घडिलेले चिरे
आयते आणून तें मंदिर बांधिलें; तें बांधीत असतां
हातोडा, कुऱ्हाड किंवा अशा कोणत्याहि लोखंडी
हत्याराचा आवाज मंदिरांत ऐकूं आला नाहीं.
८ बाहेरच्या कोठड्यांतील मजल्यांचें दार मंदिराच्या
उजव्या बाजूस होतें; लोक नागमोडी शिडी चढून
मधल्या कोठड्यांत जात; आणि मधल्यांतून वरच्या
कोठड्यांत जात. ९ या प्रकारें त्यानें मंदिर बांधून पुरें
केलें व त्यास त्यानें गंधसरूच्या फळ्या व तुळ्या यांचा
कडीपाट केला. १० सर्व मंदिरास लागून जे मजले
होते ते पांच पांच हात उंच होते व ते गंधसरूच्या
तुळ्यांनीं मंदिरास भिडविले होते.

११ मग परमेश्वराचें हें वचन शलमोनास प्राप्त
झालें: १२ तूं हें मंदिर बांधीत आहेस, त्या अर्थी
तूं माझ्या नियमांप्रमाणें चाललास, माझे निर्णय पाळिलेस
व माझ्या सर्व आज्ञा मानून त्याप्रमाणें वागलास
तर मीं जें वचन तुझा बाप दावीद यास दिलें तें
तुझ्याशीं कायम करीन. १३ मी इस्राएलामध्यें वस्ती
करीन; माझ्या इस्राएल प्रजेस मी टाकणार नाहीं.

१४ शलमोनानें तें मंदिर बांधून पुरें केलें.
१५ त्यानें त्या मंदिराच्या भिंतींस आंतल्या बाजूनें
गंधसरूच्या तक्त्यांची मढवणी केली; जमिनीपासून
कडीपाटापर्यंत आंतून तक्त्यांची मढवणी केली; आणि
मंदिराच्या जमिनीस त्यानें देवदारूची तक्तपोशी केली.
१६ मंदिराच्या मागल्या भागीं जमिनीपासून कडी-
पाटापर्यंत वीस हात गंधसरूच्या तक्त्यांची मढवणी
केली; या प्रकारें त्यानें परमपवित्रस्थानासाठीं मंदिराला
एक गाभारा तयार केला. १७ त्या गाभाऱ्या-
समोरील मंदिराची लांबी चाळीस हात होती.
१८ आंतल्या भागीं मंदिराच्या भिंती गंधसरूच्या
तक्त्यांनीं मढविल्या असून त्यांवर इंद्रावणें व फुललेलीं
फुलें कोरिलीं होतीं; चोहोंकडे गंधसरूच गंधसरू होता;
दगड असा मुळींच दृष्टीस पडत नसे. १९ मंदिराच्या
आंतल्या भागीं परमेश्वराच्या कराराचा कोश ठेवण्या-
साठीं त्यानें एक गाभारा तयार केला. २० त्या
गाभाऱ्याची लांबी, रुंदी व उंची प्रत्येकीं वीस हात होती.
त्यानें तो शुद्ध सोन्यानें मढविला होता; गंधसरूची
केलेली वेदीहि त्यानें सोन्यानें मढविली. २१ शल
मोनानें तें मंदिर आंतून शुद्ध सोन्यानें मढविलें व परम
पवित्रस्थानास त्यानें सोन्याच्या सांखळ्या आडव्या
लाविल्या व तें परमपवित्रस्थानहि सोन्यानें मढविलें.
२२ त्यानें सर्व मंदिर सोन्यानें मढवून मंदिराचें काम
समाप्त केलें; तसेंच त्यानें परमपवित्रस्थानास लागून
असलेली वेदी सगळी सोन्यानें मढविली. २३ जैतून
लाकडाचे दहा दहा हात उंच असे दोन करूब
करून त्यानें त्या गाभाऱ्यांत ठेविले. २४ करूबाचा
एक पंख पांच हात व दुसरा पंख पांच हात
होता; एका पंखाच्या टोकापासून दुसऱ्या पंखाच्या
टोकापर्यंत दहा हात अंतर होतें. २५ दुसरा करूबहि
दहा हात उंच होता; दोन्ही करूब एका मापाचे
व एका आकाराचे होते. २६ एका करूबाची उंची दहा
हात होती, दुसऱ्या करूबाचीहि तेवढीच होती. २७
आंतल्या गाभाऱ्यांत त्यानें ते करूब ठेविले; करूबांचे
पंख असे पसरले होते कीं एका करूबाचा एक पंख एका
बाजूच्या भिंतीस व दुसऱ्या करूबाचा एक पंख दुसऱ्या
बाजूच्या भिंतीस लागलेला होता; त्यांचे दुसरे दोन
पंख गाभाऱ्याच्या मधोमध एकमेकांस लागलेले होते.
२८ त्यानें ते करूब सोन्यानें मढविले. २९ त्या
मंदिराच्या सर्व भिंतींवर सभोंवार आंतून व बाहेरून
करूब, खजुरीचीं झाडें व फुललेलीं फुलें कोरिलीं होतीं.
३० त्या मंदिराची आंतली व बाहेरली जमीन सोन्यानें
मढविली होती; ३१ गाभाऱ्याच्या दारांस त्यानें जैतून
लाकडाचीं कवाडें लाविलीं होतीं; कपाळपट्टी व दाराच्या
बाह्या यांनीं भिंतीचा पांचवा भाग व्यापिला होता.
३२ तीं दोन्ही दारें जैतून लाकडाचीं असून त्यानें त्यांवर
करूब, खजुरीचीं झाडें व फुललेलीं फुलें कोरिलीं असून
तीं सोन्यानें मढविलीं होतीं; करूबांवर व खजुरीच्या
झाडांवरहि सोनें लाविलें होतें. ३३ त्यानें मंदिराच्या

दारासाठींहि जैतून लाकडाची चौकट बनविली होती;
तिनें भिंतीचा चौथा भाग व्यापिला होता; ३४ त्याचीं
दोन कवाडें देवदारूचीं होतीं: प्रत्येक कवाडाला दोन दोन
दुमटण्या होत्या. ३५ त्यानें त्यांवरहि करूब, खजुरीचीं
झाडें व फुललेलीं फुलें कोरिलीं होतीं, व हें खोदकाम
सोन्यानें मढविलें होतें. ३६ त्यानें आंतलें अंगण
बांधिलें होतें त्यास चिऱ्याच्या तीन रांगा व गंधसरूच्या
तुळयांची एक रांग लाविली होती. ३७ चौथ्या वर्षी
जिव महिन्यांत परमेश्वराच्या मंदिराचा पाया घातला;
३८ आणि अकरावे वर्षी बूल महिन्यांत म्हणजे
आठव्या महिन्यांत मंदिर आंतल्या एकंदर उपकरण-
साहित्यासहित नमुन्याप्रमाणें पुरें झालें. याप्रमाणें तें
मंदिर बांधण्यास शलमोनास सात वर्षें लागलीं.

१ शलमोनाला आपला वाडा बांधून पुरा करा-
७ वयास तेरा वर्षें लागलीं. २ त्यानें लबानोनवनगृह
नांवाची इमारत बांधिली होती; तिची लांबी शंभर
हात, रुंदी पन्नास हात व उंची तीस हात होती; ती
इमारत गंधसरू लाकडाच्या खांबांच्या चार रांगांवर उभी
होती; त्या खांबांवर गंधसरूच्या तुळया ठेविल्या होत्या.
३ खांबांच्यावर एकेका मजल्यावर पंधरा पंधरा
अशा पंचेचाळीस कोठड्या त्यानें केल्या होत्या; त्यांस
गंधसरूचा कडीपाट होता. ४ तिन्ही मजल्यांस तुळया
असून तिन्ही मजल्यांवर समोरासमोर खिडक्या होत्या.
५ सर्व दारें व त्यांच्या चौकटी चौरस होत्या,
तिन्ही मजल्यांवरील खिडक्या समोरासमोर होत्या.
६ आणखी त्यानें खांबांची एक देवडी केली होती, तिची
लांबी पन्नास हात व रुंदी तीस हात होती; त्या खांबां-
पुढें एक देवडी केली असून सर्वांपुढें एक ओटी होती;
तिला खांब होते. ७ मग सिंहासनावर बसून न्याय
करण्यासाठीं एक दिवाणखाना त्यानें केला होता; हीच
न्यायसभा होय; तिला खालपासून वरपर्यंत गंधसरूची
तक्तपोशी केली होती, ८ त्या दिवाणखान्याच्या
आंतल्या बाजूच्या चौकांत त्याचें राहावयाचें घर होतें;
तेंहि वरच्यासारखेंच बनविलें होतें. शलमोनानें फारोच्या
कन्येशीं लग्न केलें होतें, तिच्यासाठीं सदरील दिवाण-
खान्यासारखेंच घर बांधिलें होतें. ९ या सगळ्या
इमारतीस पायापासून मुंढेरीपर्यंत आंतून बाहेरून
मोलवान् तासींव चिरे लाविले होते; ते चिरे मापून
करवतींनीं चिरून तयार केले होते; बाहेरल्या मोठ्या
अंगणांत ते लाविले होते. १० त्यांचा पायाहि दहा दहा,
आठ आठ हात लांबीच्या मोठ्या व मोलवान पाषाणांचा
घातला होता. ११ त्यांवर मापून तासलेले मोलवान
पाषाण व गंधसरूचीं लाकडें हीं होतीं. १२ मोठ्या
अंगणाच्या सभोंवार तासलेल्या चिऱ्यांच्या तीन
रांगा व गंधसरूच्या तुळयांची एक रांग होती;
परमेश्वराच्या मंदिराचें आंतलें अंगण व त्या मंदिराची
देवडी यांच्याप्रमाणें ही रचना होती.

१३ मग शलमोन राजानें सोर येथून हिराम
बोलावून आणिलें. १४ तो नफताली वंशांतील एका
विधवेचा पुत्र होता; त्याचा बाप सोरांतला एक
तांबट होता; पितळेचें सगळें काम करण्यास लागणारें
शहाणपण, अक्कल व कौशल्य हीं त्याच्या ठायीं
भरपूर होतीं; तो शलमोन राजाकडे येऊन त्याचें सर्व
काम करूं लागला. १५ त्यानें पितळेचे अठरा अठरा
हात उंच असे दोन खांब तयार केले; त्या प्रत्येकाला
वेढावयास बारा हात दोरी लागे. १६ त्यानें त्या
खांबांच्या शेंड्यांवर बसविण्यासाठीं पितळेचे दोन ओतींव
कळस केले; एकेका कळसाची उंची पांच पांच हात
होती. १७ खांबांच्या शेंड्यांवरील कळसांस वुट्टीदार
जाळ्या आणि सांखळ्यांच्या माळा केल्या; एकाला
सात व दुसऱ्याला सात. १८ या प्रकारें त्यानें खांब तयार
करून त्यांच्या शेंड्यांवर प्रत्येक कळसाला झाकण्यासाठीं
जाळ्यांच्या एका रांगेवर डाळिंबाच्या दोन रांगा
केल्या. १९ जे कळस देवडीच्या खांबांच्या
शेंड्यांवर होते त्यांच्या चार हात जागेंत कमळांचें
काम केलें होतें. २० प्रत्येक खांबाच्या शेंड्यावर
जाळीला लागून असलेल्या गोलाईच्या जवळ आणखी
एक कळस केला होता; आणि प्रत्येक कळसावर
ओळीनें दोनशें डाळिंबांच्या रांगा काढिल्या
होत्या. २१ हे खांब त्यानें मंदिराच्या देवडीजवळ

उभे केले होते; उजवीकडला खांब उभा केला
त्यास याखीन ( तो स्थापील ) हें नांव दिलें होतें व डाव्या
बाजूस खांब उभा केला त्यास बवाज ( त्याच्या ठायीं
सामर्थ्य ) हें नांव दिलें होतें. २२ खांबांच्या शेंड्यांवर
कमळें काढलेलीं होतीं; खांबांचें काम अशा प्रकारें
संपलें. २३ मग त्यानें एक गंगाळसागर ओतविला होता;
त्याचा कांठाकडला व्यास दहा हात होता; त्याचा
आकार गोल असून त्याची उंची पांच हात होती व
त्याचा परीघ तीस हात होता. २४ त्याच्या काठाखालीं
सभोवार एका एका हाताच्या अंतरानें दहा दहा
इंद्रावणें कोरिलीं होतीं; तीं त्या सगळ्या गंगाळसागरा-
सभोवतीं होतीं; हा गंगाळसागर ओतिला तेव्हांच इंद्रा-
वणांच्या ह्या दोन रांगा त्याच्या अंगच्याच ठेविल्या
होत्या. २५ हा गंगाळसागर बारा बैलांवर ठेविला होता;
त्यांपैकीं तीन उत्तराभिमुख, तीन पश्चिमाभिमुख, तीन
दक्षिणाभिमुख, व तीन पूर्वाभिमुख होते; त्यांच्यावर
तो गंगाळसागर ठेविला असून त्या सर्वांचे मागले भाग
आंतल्या अंगास होते. २६ त्याची जाडी वीतभर
होती; त्याचा कांठ कटोऱ्याच्या कांठासारखा असून
त्यावर कमलपुष्पें कोरलीं होतीं; त्यांत दोन हजार
बथ पाणी राहत असे. २७ त्यानें पितळेचे दहा
चौरंग केले होते; प्रत्येक चौरंगाची लांबी चार हात, रुंदी
चार हात व उंची तीन हात होती. २८ चौरंगाची
घडण येणेंप्रमाणें होती; त्यांस पत्रे लाविले होते आणि
ह्या पत्र्यांस सभोवार कंगोरे होते; २९ कंगोऱ्यां-
मधल्या पत्र्यांवर सिंह, बैल व करूब यांच्या आकृति
कोरिल्या होत्या; त्या कंगोऱ्यांवर एक बैठक होती;
सिंहांच्या व बैलांच्या खालीं लोंबत्या माळा कोरिल्या
होत्या. ३० प्रत्येक चौरंगाला पितळेचीं चार चार
चाकें व पितळेच्या धुऱ्या केल्या होत्या; प्रत्येकाच्या
चारी पायांस लागून ओतींव खांदे होते; ते खांदे
गंगाळ ठेवण्याकरितां वरच्या भागीं ओतून जोडिले होते;
त्यांच्या बाजू माळांनीं शृंगारिल्या होत्या. ३१ कळसांच्या
आंतल्या बाजूपासून वरपर्यंत त्याचें तोंड एक हात
उंच होतें; हें तोंड बैठकीसारखें असून त्याचा व्यास
दीड हात होता; त्याच्यावरहि कांहीं कोरींव काम होतें;
त्याच्या पट्ट्या गोल नसून चौकोनी होत्या. ३२ चारी चकें
पट्ट्यांच्या खालीं होतीं; आणि प्रत्येक चक्राच्या धुऱ्या
तळाशीं जोडिल्या होत्या; त्या प्रत्येक चक्राची उंची
दीड हात होती. ३३ चक्राची घडण रथचक्रासारखी
होती; त्यांच्या धुऱ्या, पुठ्ठे, आरे आणि तुंबे
हीं सर्व ओतींव होतीं. ३४ प्रत्येक चौरंगाच्या
चारी कोपऱ्यांस चार खांदे होते; हे खांदे व
चौरंग दोन्ही अखंड होते. ३५ प्रत्येक चौरंगावर
अर्धा हात उंच गोलाकार झांकण होतें; आणि त्या
झाकणाचे टेकावे व त्याच्या पट्ट्या हीं चौरंगाशीं
अखंड होतीं. ३६ त्या टेकाव्यांच्या पृष्ठभागावर व
पत्र्यांवर त्यांच्या त्यांच्या परिमाणाप्रमाणें करूब,
सिंह, खजुरीचीं झाडें कोरिलीं होतीं व सभोवार माळा
दाखविल्या होत्या. ३७ या प्रकारें त्यांनीं ते दहा
चौरंग केले; ते सर्व एकाच सांच्याचे, एकाच मापाचे व
एकाच आकाराचे होते. ३८ आणखी त्यानें पितळेचीं
दहा गंगाळें केलीं होतीं; एकेका गंगाळांत चाळीस
चाळीस बथ पाणी राहत असे; त्या प्रत्येक गंगाळाचा
व्यास चार हात होता; त्या दहा चौरंगांतील प्रत्येकावर
एक एक गंगाळ होतें. ३९ त्यानें पांच गंगाळें मंदिराच्या
दक्षिणेस व पांच गंगाळें उत्तरेस ठेविलीं होतीं; आणि
गंगाळसागर मंदिराच्या उजवीकडे, आग्नेयीस ठेविला
होता. ४० तसेंच हिरामानें गंगाळें, पावडीं व कटोरे हीं
बनविलीं. या प्रकारें हिरामानें शलमोन राजासाठीं परमे-
श्वराच्या मंदिराचें जें काम करावयाचें होतें तें संपविलें;
४१ तें असें: दोन खांब, त्या खांबांच्या शेंड्यांवरील
कळसांचे प्याल्याच्या आकाराचे भाग, व त्या दोन्ही
खांबांच्या शेंड्यांवरील प्याल्याच्या आकाराच्या कळसांचे
भाग झांकण्यासाठीं जाळ्या केल्या; ४२ त्या दोन
जाळ्यांसाठीं चारशें डाळिंबें केलीं; खांबांच्या शेंड्यां-
वरील प्याल्याच्या आकाराच्या कळसांचे भाग झाका-
वयाच्या जाळ्यांसाठीं ह्या डाळिंबांच्या दोन दोन रांगा
होत्या; ४३ दहा चौरंग व त्यांच्यावरील दहा गंगाळें;

१ एक माप.

४४ एक गंगाळसागर व त्याच्याखालचे बारा बैल;
४५ तशींच पात्रें, पावडीं व कटोरे हीं बनविलीं होतीं;
परमेश्वराच्या मंदिरांतील जीं हीं पात्रें हिरामानें
शलमोन राजासाठीं बनविलीं होतीं तीं सर्व पितळेचीं
असून त्यांस जिल्हई दिली होती. ४६ राजानें तीं
यार्देन खोऱ्यांत सुक्कोथ व सारतान यांच्यामधील
प्रदेशांतल्या चिकणमातींत ओतविलीं होतीं. ४७ तीं
पात्रें पुष्कळ असल्यामुळें शलमोनानें तीं वजन केल्या-
वांचून ठेविलीं होतीं, पितळेचें वजन काढिलें नव्हतें;
४८ परमेश्वराच्या मंदिरांत जितकीं पात्रें होतीं तितकीं
सगळीं शलमोनानें करविलीं; तीं हीं: वेदी व
समर्पित भाकरी ठेवण्याचें मेज हीं सोन्याचीं केलीं होतीं;
४९ गाभाऱ्यासमोरील उजवीकडल्या पांच व डावी-
कडल्या पांच समया शुद्ध सोन्याच्या करविल्या होत्या;
त्यांचा पुष्पशृंगार, चाडीं व चिमटे हीं सोन्याचीं
करविलीं होतीं; ५० पेले, कातरी, कटोरे, चमचे व
धूपदानें हीं शुद्ध सोन्याचीं करविलीं होतीं; तसेंच
मंदिराचा अंतर्भाग म्हणजे परमपवित्रस्थान याच्या
कवाडांचीं, व मंदिराच्या म्हणजे पवित्रस्थानाच्या
कवाडांचीं बिजागरें सोन्याचीं करविलीं होतीं. ५१ या
प्रकारें परमेश्वराच्या मंदिराचें जें जें काम शलमोन
राजानें हातीं घेतलें तें समाप्त झालें. नंतर आपला
बाप दावीद यानें समर्पिलेलें सोनें, चांदी अणि पात्रें
हीं शलमोनानें आंत आणून परमेश्वराच्या मंदिराच्या
भांडारांत ठेविलीं.

१ मग शलमोन राजानें परमेश्वराच्या कराराचा
८ कोश दावीदपुरांतून म्हणजे सीयोनांतून वरतीं
आणावयासाठीं इस्राएलाचे वडील जन, वंशांचे
सर्व मुख्य व सर्व पितृकुळांचे सरदार यांस शलमोन
राजाकडे यरुशलेमांत जमा केलें. २ सर्व इस्राएल
पुरुष एथानीम मासीं म्हणजे सातव्या महिन्यांतल्या
सणाच्या दिवसांत शलमोन राजापाशीं जमा झाले.
३ इस्राएल लोकांत सर्व वडील जन आले तेव्हां
याजकांनीं कोश उचलून घेतला. ४ परमेश्वराचा
कोश, दर्शनमंडप आणि त्या मंडपांतील सर्व पवित्र
पात्रें हीं सर्व याजक लेवी यांनीं वरतीं वाहून नेलीं.
५ शलमोन राजा व त्याजपाशीं जमलेली सर्व इस्राएल
मंडळी यांनीं कोशापुढें शेरडांमेंढरांचे व गुरांढोरांचे
बलि इतके अर्पण केले कीं त्यांच्या संख्येची मोजदाद
करितां आली नाहीं. ६ मग याजकांनीं परमेश्वराच्या
कराराचा कोश मंदिराच्या गाभाऱ्यांत, परम-
पवित्रस्थानांत, करूबांच्या पंखांखालीं त्याच्या ठिकाणीं
नेऊन ठेविला. ७ कोशस्थानाच्या वर करूबांचे पंख
पसरले होते; तो कोश व त्याचे दांडे यांवर त्यांचें
आच्छादन होतें; ८ त्याचे दांडे एवढे लांब होते कीं
त्यांचीं शेवटें गाभाऱ्यासमोरल्या पवित्रस्थानांतून
दिसत; परंतु पवित्रस्थानाबाहेरून तीं दिसत नसत; ते
दांडे आज दिवसपर्यंत तेथेंच आहेत. ९ इस्राएल लोक
मिसर देशांतून निघाल्यावर परमेश्वरानें त्यांशीं करार
केला त्या समयीं होरेबांत मोशानें या कोशांत दोन दगडी
पाट्या ठेविल्या होत्या; त्यांखेरीज त्यांत दुसरें कांहीं
नव्हतें. १० याजक पवित्रस्थानांतून बाहेर आले तेव्हां
परमेश्वराचें मंदिर मेघानें व्यापिलें. ११ त्या मेघामुळें
याजकांस सेवाचाकरी करण्यास उभें राहवेना; कारण
परमेश्वराच्या तेजानें परमेश्वराचें मंदिर भरून गेलें.

१२ मग शलमोन राजा म्हणाला, परमेश्वरानें
म्हटलें आहे कीं मी निबिड अंधकारांत वस्ती करीन.
१३ तुझ्यासाठीं निवासस्थान, तुला युगानुयुग राहावया-
साठीं मंदिर मीं बांधिलें आहे. १४ मग राजानें
मागें वळून इस्राएलाच्या सर्व मंडळीस आशीर्वाद दिला,
तेव्हां ती सर्व मंडळी उठून उभी राहिली. १५ तो
म्हणाला, इस्राएलाचा देव परमेश्वर धन्य; त्यानें
माझा बाप दावीद यास स्वमुखानें हें वचन दिलें
होतें व त्यानें स्वहस्तें हें पूर्ण केलें; तें वचन असें:
१६ मीं आपल्या इस्राएल लोकांस मिसर देशांतून
बाहेर आणिलें त्या दिवसापासून माझ्या नामाच्या
निवासार्थ मंदिर बांधावयासाठीं कोणाहि इस्राएल
वंशांकडून मीं कोणतेंहि नगर निवडून घेतलें नाहीं,
पण माझे लोक इस्राएल यांजवर दाविदास मीं निवडून
नेमिलें आहे. १७ माझा बाप दावीद याचा मनोदय

असा होता कीं इस्राएलाचा देव परमेश्वर याच्या नामा-
प्रीत्यर्थ एक मंदिर बांधावें; १८ पण परमेश्वरानें माझा
बाप दावीद यास सांगितलें कीं परमेश्वराच्या नामा-
प्रीत्यर्थ मंदिर बांधावें असा तूं मनोदय धरिला
आहे हें तूं चांगलें केलें आहे; १९ पण तूं
तें मंदिर बांधणार नाहींस, तर तुझ्या पोटीं जो पुत्र
येईल तो माझ्या नामाप्रीत्यर्थ मंदिर बांधील.
२० परमेश्वर जें हें वचन बोलला तें त्यानें पुरें
केलें; मी आपला बाप दावीद याच्या जागीं
येऊन परमेश्वराच्या वचनानुसार इस्राएलाच्या गादीवर
बसलों आहें; आणि इस्राएलाचा देव परमेश्वर याच्या
नामाप्रीत्यर्थ मीं हें मंदिर बांधिलें आहे. २१ परमे-
श्वरानें आमचे वाडवडील मिसर देशांतून आणिले त्या
समयीं त्यांजशीं परमेश्वराचा जो करार झाला तो त्या
कोशांत आहे; त्यासाठीं मीं स्थान तयार केलें आहे.

२२ शलमोनानें इस्राएलाच्या सर्व मंडळीदेखत
परमेश्वराच्या वेदीसमोर उभें राहून आकाशाकडे हात
पसरिले; २३ तो म्हणाला, हे परमेश्वरा, इस्राएलाच्या
देवा, वर आकाशांत अथवा खालीं पृथ्वीवर तुझ्या-
समान कोणी देव नाहीं; जे तुझे सेवक जिवेंभावें तुझ्या
समोर वर्ततात त्यांच्याशीं तूं आपल्या करारानुसार व
दयेनें वर्ततोस; २४ जें वचन तूं आपला सेवक, माझा बाप
दावीद, यास दिलें तें तूं पाळिलें आहे; जें तूं आपल्या
मुखानें बोललास तें तूं आपल्या हातानें पुरें केलें आहे;
अशी आज वस्तुस्थिति आहे. २५ तर आतां हे इस्रा-
एलाच्या देवा, परमेश्वरा, तुझा सेवक, माझा बाप
दावीद, यास तूं असें वचन दिलें होतें कीं तूं मजसमोर
वागत आलास त्याप्रमाणेंच तुझे वंशज आपली चाल-
चालणूक ठेवण्याची खबरदारी घेतील तर माझ्या-
समक्ष इस्राएलाच्या राजासनावर बसणाऱ्या तुझ्या
कुळांतल्या पुरुषांची परंपरा कधींहि खुंटावयाची नाहीं;
त्यास दिलेलें हें वचनहि तूं पुरें कर. २६ तर आतां
हे इस्राएलाच्या देवा, तूं जें वचन तुझा सेवक, माझा
बाप दावीद, यास दिलें होतें तें प्रत्ययास येऊं दे.
२७ देव या भूतलावर खरोखर वास करील काय?
आकाश व नभोमंडळ यांत तुझा समावेश होणें नाहीं;
तर हें मंदिर मीं बांधिलें आहे यांत तो कसा व्हावा?
२८ तरी हे माझ्या देवा, परमेश्वरा, तुझ्या सेवकाच्या
प्रार्थनेकडे, विनंतीकडे लक्ष दे; आज तुझा सेवक
तुझा धावा करीत आहे व तुजपुढें प्रार्थना करीत आहे,
तिच्याकडे कान दे; २९ माझ्या नामाचा निवास येथें
होईल असें ज्या स्थलाविषयीं तूं म्हटलें त्या ह्या स्थलाकडे,
ह्या मंदिराकडे अहोरात्र तुझी दृष्टि असो; जी प्रार्थना
तुझा सेवक या स्थलाकडे तोंड करून करीत आहे ती
ऐक. ३० तुझ्या सेवकाच्या विनवणीकडे आणि तुझे
लोक इस्राएल ह्या स्थलाकडे तोंड करून तुझी विनवणी
करतील तिच्याकडे तूं कान दे; स्वर्गांतील तुझ्या
निवासस्थानीं तूं ती श्रवण कर आणि श्रवण करून
त्यांना क्षमा कर. ३१ एकाद्यानें आपल्या शेजाऱ्याचा
अपराध केल्यामुळें त्यास शपथ घ्यावयास लाविली,
आणि ती या मंदिरांत तुझ्या वेदीसमोर त्यानें घेतली,
३२ तर तूं स्वर्गलोकांतून ती श्रवण कर, आणि त्याप्रमाणें
घडवून आण; आपल्या सेवकांचा न्याय करून दुष्टास दुष्ट
ठरीव आणि ज्याचें कर्म त्याच्या माथीं येऊं दे;
निर्दोष्यास निर्दोषी ठरवून त्याच्या निर्दोषतेप्रमाणें
त्यास फळ दे. ३३ तुझे लोक इस्राएल यांनीं तुजविरुद्ध
पाप केल्यामुळें शत्रूपुढें त्यांचा मोड झाल्यावर ते पुनः
तुजकडे वळतील आणि तुझ्या नामाचा स्वीकार
करून या मंदिरांत तुझी प्रार्थना व विनवणी करितील,
३४ तेव्हां तूं स्वर्गलोकांतून त्यांचें ऐक, तुझे लोक
इस्राएल यांच्या पापाची क्षमा कर आणि जो देश तूं
त्यांच्या पूर्वजांस दिला त्यांत त्यांस परत आण.
३५ त्यांनीं तुजविरुद्ध पाप केल्यामुळें आकाशकपाटें
बंद झालीं आणि पर्जन्यवृष्टि खुंटली असतां त्यांनीं
या स्थानाकडे तोंड करून प्रार्थना केली, तुझ्या
नामाचा स्वीकार केला व तूं त्यांस दीन केल्यामुळें
ते तुजकडे वळले, ३६ तर तूं स्वर्गलोकांतून त्यांचें ऐक.
इस्राएल तुझी प्रजा, तुझे सेवक, यांच्या पापाची क्षमा
कर, कारण ज्या सन्मार्गानें त्यांनीं चाललें पाहिजे तो
तूं त्यांस शिकवीत आहेस; हा जो देश तूं आपल्या

लोकांस वतन करून दिला आहे त्यावर पर्जन्यवृष्टि
कर. ३७ या देशावर दुष्काळ, मरी, शेतें करपवून
टाकणारा वारा अथवा भेरड, टोळ अथवा नाकतोडे
हे आले, अथवा शत्रूंनीं त्यांच्या एकाद्या शहरास वेढा
घातला, कोणतीहि आपत्ति अथवा रोग त्यांजवर आला,
३८ तेव्हां इस्राएलांतील एकादा माणूस किंवा तुझे
सगळे इस्राएल लोक आपल्या जीवाला होणारा क्लेश
ओळखून जी प्रार्थना किंवा विनवणी या मंदिराकडे आपले
हात पसरून करितील, ३९ ती तूं स्वर्गांतील आपल्या
निवासस्थानांतून ऐक, त्यांना क्षमा कर, त्याप्रमाणें
घडवून आण. प्रत्येकाचें मन ओळखून त्याच्या सर्व
वर्तनानुसार त्यास फळ दे; कारण सर्व मानवजातींचीं
मनें ओळखणारा केवळ तूंच आहेस; ४० म्हणजे
जो देश तूं आमच्या पूर्वजांस दिला त्यांत ते
राहतील तितके दिवस ते तुझें भय बाळगितील.
४१ तुझ्या इस्राएल लोकांतला नव्हे असा कोणी पर-
देशीय तुझ्या नामास्तव परदेशाहून आला, ४२ (कारण
तुझें मोठें नाम, बलिष्ठ हात व पुढें केलेला बाहु हीं
सर्व त्यांच्या ऐकण्यांत येणारच,) आणि त्यानें येऊन
ह्या मंदिराकडे तोंड करून प्रार्थना केली, ४३ तर तूं
आपल्या स्वर्गांतील निवासस्थानांतून ती ऐक व हा
परदेशीय ज्या कशासाठीं तुझा धावा करील तें कर;
म्हणजे या भूतलावरील सर्व देशांचे लोक तुझें नाम
ओळखून तुझ्या इस्राएल लोकांप्रमाणें तुझें भय
बाळगितील आणि मीं जें हें मंदिर बांधिलें आहे
त्यावर तुझें नाम आहे हें त्यांस कळून येईल. ४४ तुझे
लोक तूं पाठविशील तिकडे आपल्या शत्रूंशीं सामना
करण्यास जातील आणि तूं निवडिलेल्या या नगराकडे
व तुझ्या नामाकरितां मीं बांधिलेल्या या मंदिराकडे
तोंड करून तुझी प्रार्थना करितील, ४५ तर तूं
स्वर्गांतून त्यांची ती प्रार्थना व विनवणी ऐक व त्यांस
न्याय दे. ४६ त्यांनीं तुजविरुद्ध पाप केलें, (कारण पाप
करीत नाहीं असा कोणीच नाहीं,) व तूं त्यामुळें
क्रोधायमान होऊन त्यांस त्यांच्या शत्रूंच्या हातीं दिलें
आणि त्यांनीं त्यांस जवळच्या अथवा दूरच्या देशीं
पाडाव करून नेलें, ४७ तर ज्या देशांत त्यांस पाडाव
करून नेलें तेथें ते विचार करितील आणि आपणाला
पाडाव करून नेणाऱ्या लोकांच्या देशांत तुजकडे
वळून तुझी विनवणी करून म्हणतील, आम्हीं पाप केलें
आहे, आम्ही कुटिलतेनें वागलों आहों, आम्हीं
दुराचरण केलें आहे, ४८ आणि ज्यांनीं त्यांस पाडाव
करून नेलें त्या त्यांच्या शत्रूंच्या देशीं ते तुजकडे जिवें-
भावें वळून, त्यांच्या पूर्वजांस दिलेल्या देशाकडे, तूं
निवडलेल्या नगराकडे, तुझ्या नामाकरितां मीं बांधिलेल्या
ह्या मंदिराकडे तोंड करून तुझी प्रार्थना करितील
४९ तेव्हां तूं आपल्या स्वर्गांतील निवासस्थानांतून
त्यांची प्रार्थना व विनवणी ऐक, त्यांस न्याय दे;
५० तुझ्या लोकांनीं जें पाप तुझ्याविरुद्ध केलें असेल
व जे कांहीं अपराध तुझ्याविरुद्ध केले असतील त्या
सर्वांची त्यांस क्षमा करून, त्यांचा पाडाव करणाऱ्यांच्या
मनांत दया उत्पन्न कर म्हणजे ते त्यांच्यावर दया
करितील; ५१ कारण, ज्यांस तूं मिसर देशांतून,
लोखंडाच्या भट्टींतून काढिलें तेच हे तुझे लोक,
तुझें वतन होत; ५२ तर तुझे नेत्र तुझ्या सेवकाच्या
विनवणीकडे व तुझ्या इस्राएल लोकांच्या विनवणीकडे
उघडे राख; ते तुझा धावा करितील; त्याजकडे कान दे;
५३ कारण, हे प्रभू देवा, तूं आमच्या वडिलांस मिसर
देशांतून काढिलें त्या वेळीं तुझा सेवक मोशे याच्या द्वारें
तूं वचन दिलें, तदनुसार हे लोक तुझें वतन व्हावें
म्हणून या भूतलावरल्या सर्व राष्ट्रांपासून तूं त्यांस
वेगळें केलें आहे.

५४ शलमोनानें आकाशाकडे हात पसरून व परमे-
श्वराच्या वेदीसमोर गुडघे टेकून ही सर्व प्रार्थना व
विनवणी परमेश्वरापाशीं करण्याचें संपविल्यावर तो
तेथून उठला. ५५ त्यानें उभें राहून सर्व
इस्राएल मंडळीस उच्च स्वरानें आशीर्वाद दिला; तो
म्हणाला, ५६ ज्या परमेश्वरानें आपल्या वचनानुसार
आपल्या इस्राएल लोकांस विसावा दिला तो धन्य;
तो आपला सेवक मोशे याच्या द्वारें जें वचन बोलला
त्यांतला एकहि शब्द व्यर्थ गेला नाहीं. ५७ आपला

देव परमेश्वर जसा आपल्या पूर्वजांच्या बरोबर राहत
असे तसाच तो आपल्याबरोबर राहो; तो आम्हांस
न सोडो, तो आम्हांस न टाको; ५८ आम्हीं त्याच्या
सर्व मार्गांनीं चालावें, त्यानें आमच्या पूर्वजांस
दिलेल्या सर्व आज्ञा, नियम व निर्णय आम्हीं पाळावे
म्हणून तो आमचीं मनें आपल्याकडे लावो.
५९ ज्या शब्दांनीं मीं परमेश्वरापुढें विनंति केली
आहे ते आपला देव परमेश्वर याच्यापाशीं रात्रंदिवस
राहोत आणि प्रतिदिनीं जरूर पडेल तसा तो आपल्या
सेवकांस व आपल्या इस्राएल लोकांस न्याय देवो.
६० यावरून या भूतलावरील सर्व राष्ट्रें समजतील
कीं परमेश्वर हाच देव आहे; अन्य कोणी नव्हे.
६१ तर तुमचें मन आपला देव परमेश्वर याजकडे
असें पूर्णपणें लागलेलें असो कीं आजच्यासारखें
त्याच्या नियमांप्रमाणें तुम्हीं चालावें व त्याच्या आज्ञा
पाळाव्या. ६२ मग राजानें व त्याच्याबरोबर सर्व
इस्राएल लोकांनीं परमेश्वरासमोर यज्ञबलि अर्पिले.
६३ शलमोनानें शांत्यर्पणांसाठीं परमेश्वरापुढें अर्पिलेले
बलि बावीस हजार बैल आणि एक लाख वीस हजार
मेंढरें होतीं. अशा रीतीनें राजानें व सर्व इस्राएलांनीं
परमेश्वराच्या मंदिराचें प्रतिष्ठापन केलें. ६४ त्या दिवशीं
राजानें परमेश्वराच्या मंदिराच्या पुढल्या अंगणामध्यें
एक स्थान पवित्र करून होमबलि, अन्नबलि आणि
शांत्यर्पणांची वपा हीं तेथेंच अर्पिलीं; कारण परमे-
श्वरासमोर असलेल्या पितळेच्या वेदीवर त्यांचा
समावेश होईना. ६५ शलमोनानें व त्याच्या-
बरोबर सर्व इस्राएल लोकांनीं त्या समयीं महोत्सव
केला, हमाथाच्या घाटापासून मिसर देशाच्या नाल्या-
पर्यंत सर्व इस्राएल लोकांचा मोठा जमाव एक
सप्तक व आणखी एक सप्तक म्हणजे एकंदर
चौदा दिवस आपला देव परमेश्वर याच्यासमोर
उत्सव करीत राहिला. ६६ आठव्या दिवशीं त्यानें
लोकांची रवानगी केली; ते सर्व राजाचें अभीष्ट
चिंतून आपआपल्या डेऱ्यांस गेले; आपला सेवक
दावीद व आपले लोक इस्राएल यांजवर जो प्रसाद
परमेश्वरानें केला त्यामुळें त्यांना आनंद वाटला व
त्यांचीं मनें हर्षभरित झालीं.

९ १ शलमोनानें परमेश्वराचें मंदिर व राजवाडा
बांधावयाचें संपविलें व ह्याप्रमाणें त्याच्या मनास जें
करावेंसें वाटलें तें त्यानें केलें. २ तेव्हां परमेश्वरानें
त्यास गिबोन येथें दर्शन दिलें होतें त्याप्रमाणें त्यास
दुसऱ्यानें दर्शन दिलें. ३ परमेश्वर त्यास म्हणाला,
तूं मजसमोर केलेली प्रार्थना व विनवणी मीं ऐकली
आहे; हें जें मंदिर तूं बांधिलें आहे त्यास माझें नाम
सर्वकाळ राहावें म्हणून मीं तें पवित्र केलें आहे;
माझी दृष्टि व माझें चित्त त्यावर सतत राहील. ४ तूं
आपला बाप दावीद याच्याप्रमाणें खऱ्या मनानें व
सरळतेनें माझ्यासमक्ष चालशील, माझ्या सर्व आज्ञां-
प्रमाणें वागशील आणि माझे नियम व निर्णय
पाळिशील, ५ तर इस्राएलावरील तुझें राजासन
मी कायमचें स्थापीन; तुझा बाप दावीद यास मीं वचन
दिल्याप्रमाणें इस्राएलाच्या गादीवर बसावयाला तुझ्या
कुळांतला पुरुष खुंटावयाचा नाहीं; ६ पण तुम्हीं व
तुमच्या संततीनें माझें अनुसरण करण्याचें सोडिल्यास,
मीं तुम्हांस लावून दिलेले आज्ञा व नियम न पाळल्यास
आणि मला सोडून अन्य देवांची उपासना व
भजनपूजन केल्यास, ७ जो देश मी इस्राएल
लोकांस दिला आहे त्यांतून त्यांचा उच्छेद करीन
आणि हें जें मंदिर मीं आपल्या नामाकरितां
पवित्र केलें आहे तें माझ्या नजरेआड करीन, तसेंच
इस्राएल लोक इतर सर्व राष्ट्रांत दृष्टांताचा व निंदेचा
विषय होतील; ८ आणि हें मंदिर उंच स्थानीं राहील
तरी त्याच्याजवळून जाणारेयेणारे चकित होतील व
छीथू करून म्हणतील, परमेश्वरानें या देशाचें व
या मंदिराचें असें कां केलें? ९ तेव्हां लोक म्हणतील,
त्यांचा देव परमेश्वर यानें त्यांच्या वाडवडिलांस मिसर
देशांतून आणिलें असून ते त्यास सोडून अन्य देवांच्या
नादीं लागले व त्यांचें भजनपूजन व उपासना करूं
लागले, ह्यामुळें परमेश्वरानें ही सर्व विपत्ति त्यांजवर
आणिली आहे.

१० परमेश्वराचें मंदिर व राजवाडा हीं दोन्ही पुरीं
करण्यास वीस वर्षें लागलीं. ११ त्यानंतर शलमोनानें
सोराचा राजा हीराम यास गालील प्रांतांतलीं वीस
नगरें दिलीं, कारण त्यानें शलमोनास हवे होते
तितके गंधसरू, देवदारु व सोनें हीं पुरविलीं होतीं.
१२ शलमोनानें आपणास दिलेलीं नगरें पाहण्यास
हीराम सोराहून तेथें गेला; तीं त्याला पसंत पडलीं
नाहींत. १३ तेव्हां तो म्हणाला, हे माझ्या बंधो,
कसलीं हीं नगरें तूं मला दिलीं? त्यानें त्यांस काबूल
प्रांत हें नांव ठेविलें; हेंच नांव आजवर चालू आहे.
१४ हीरामानें राजाकडे एकशेंवीस किक्कार सोनें
पाठविलें.

१५ शलमोन राजानें लोक वेठीस धरून परमेश्वराचें
मंदिर, आपला राजवाडा, मिल्लो, यरुशलेमाचा तट,
हासोर, मगिद्दो व गेजेर हीं उभारिलीं त्याचा वृत्तांत
असा; १६ मिसर देशाचा राजा फारो यानें गेजेरवर
चढाई करून तें घेतलें आणि आग लावून जाळून
टाकिलें व तेथल्या कनानी रहिवाश्यांचा संहार केला.
त्यानें तें नगर आपली कन्या शलमोनाची बायको
हीस आंदण म्हणून दिलें. १७ शलमोनानें गेजेरा-
खालचें बेथ-होरोन, १८ बालाथ व रानांतलें तदमोर हीं
बांधिलीं; १९ ह्यांखेरीज आणखी भांडारासाठीं व रथ
व स्वार यांच्यासाठीं नगरें बांधिलीं आणि तसेंच यरुश-
लेमांत, लबानोनावर व आपल्या सर्व राज्यांत आपल्या
मनास आलें तेंहि सर्व त्यानें बांधिलें. २० अमोरी,
हित्ती, परिज्जी, हिव्वी व यबूसी ह्या इस्राएल नसलेल्या
लोकांतले अवशिष्ट लोक, २१ देशांत राहून गेले होते;
त्यांना इस्राएल लोकांस अगदीं नष्ट करतां आलें नाहीं;
त्यांच्या वंशजांवर शलमोनानें वेठबिगार बसवून त्यांस
दास्य करावयास लाविलें; आजवर असेंच चालत आलें
आहे; २२ पण इस्राएल लोकांपैकीं कोणासहि शलमोनानें
दास करून ठेविलें नाहीं; ते योद्धे, कामदार,
सरदार, सेनापति आणि रथ व स्वार यांवरचे
अधिपति होते. २३ शलमोनाच्या कामावर देखरेख
करणारे नायक हेच होते; ते पांचशें पन्नास होते; जे
लोक ह्या कामावर होते त्यांजवर त्यांची हुकमत असे.
२४ मग फारोची कन्या आपणासाठीं शलमोनानें बांधिलेल्या
मंदिरांत राहण्यास दावीदपुर सोडून आली;
तेव्हां त्यानें मिल्लो नगर बांधिलें. २५ जी वेदी
शलमोनानें परमेश्वराप्रीत्यर्थ बांधिली होती तीवर
वर्षांतून तीन वेळां शलमोन होमबलि व शांत्यर्पणें
अर्पीत असे; तसेंच परमेश्वरासमोर असलेल्या
वेदीवर तो धूप जाळीत असे. या प्रकारें त्यानें मंदिर
समाप्त केलें.

२६ मग शलमोन राजानें अदोम देशांत तांबड्या
समुद्राच्या तीरीं एलोथाजवळील एसयोन-गेबेर येथें
गलबतांचा तांडा केला. २७ हिरामानें आपल्या
ताब्यांतील दर्यावर्दी लोक शलमोनाच्या कामदारां-
बरोबर काम करण्यास त्या गलबतांवर पाठविले.
२८ त्यांनीं ओफिरास जाऊन तेथून चारशें वीस
किक्कार सोनें शलमोन राजाकडे आणिलें.

१० १ परमेश्वराच्या नामासंबंधानें शलमोनाची
कीर्ति झाली ती ऐकून शबाची राणी कूटप्रश्नांनीं
त्याची परीक्षा पाहावयास आली. २ ती
आपल्याबरोबर मोठा लवाजमा घेऊन आणि विपुल
सोनें, मोलवान् रत्नें व मसाले उंटांवर लादून यरुशले-
मास आली. शलमोनाकडे आल्यावर आपल्या
मनांत जें कांहीं होतें तें सर्व ती त्याजपुढें बोलली.
३ शलमोनानें तिच्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें दिलीं; त्यानें
तिला उलगडा करून सांगितली नाहीं अशी एकहि
गोष्ट नव्हती. ४ शलमोनाचें सगळें शहाणपण, त्यानें
बांधिलेलें मंदिर, ५ त्याच्या मेजवानींतील पक्वान्नें,
त्याच्या कामदारांचीं आसनें, त्याच्या मानकऱ्यांची
खिदमत व त्यांचे पोषाक, त्याचे प्यालेबरदार व परमे-
श्वराच्या मंदिरांत चढून जावयाचा त्याचा तो जिना हीं
सगळीं पाहून शबाची राणी गांगरून गेली. ६ ती राजास
म्हणाली, आपली करणी व ज्ञान यांविषयींची जी कीर्ति
मीं आपल्या देशीं ऐकली ती खरी आहे. ७ तथापि
मीं येऊन प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिल्याशिवाय या

१ निर्गम २५:३९ पाहा.

गोष्टींचा मला विश्वास येईना; आतां पाहत्यें तों
माझ्या कानीं आलें तें अर्धेंहि नव्हतें. आपलें शहाणपण व
समृद्धि ह्यांची कीर्ति झाली आहे तीहून तीं अधिक
आहेत. ८ आपले लोक धन्य होत; हे आपले सेवक,
ज्यांना आपणासमोर सतत उभे राहून आपल्या शहाण-
पणाचा लाभ होत असतो ते धन्य होत. ९ ज्यानें
आपणांवर प्रसन्न होऊन आपणाला इस्राएलाच्या गादीवर
स्थापिलें आहे तो आपला देव परमेश्वर धन्य होय; परमेश्वर
इस्राएलावर सदा प्रेम करितो म्हणून न्यायाचें व धर्माचें
पालन करण्यासाठीं त्यानें आपणाला राजा केले आहे.
१० तिनें राजास एकशेंवीस किक्कार सोनें, विपुल
सुगंधी द्रव्यें व बहुमोल रत्नें नजर केलीं; शबाच्या
राणीनें शलमोन राजास एवढीं सुगंधी द्रव्यें नजर केलीं कीं
तेवढीं पुनः कधीं कोठून आलीं नाहींत. ११ हिरामाचीं
जहाजें ओफीर येथून सोनें आणीत त्याप्रमाणेंच
रक्तचंदनाचें लाकूड आणि बहुमोल रत्नेंहि विपुल
आणीत. १२ राजानें रक्तचंदनाच्या लाकडाचे परमे-
श्वराच्या मंदिराला व राजवाड्याला कठडे केले; त्या-
प्रमाणेंच गाणाऱ्यांसाठीं त्याच्या वीणा व सारंग्या बनविल्या;
असलें रक्तचंदनाचें लाकूड आजवर आलें नाहीं कीं
दृष्टीस पडलें नाहीं. १३ शलमोनानें राजास अनुरूप अशा
औदार्यानें जें तिला दिलें त्याशिवाय आणखी तिनें जें जें
मागितलें तें तें सगळें तिला देऊन तिची इच्छा पुरविली.
मग ती आपल्या परिवारासह स्वदेशीं परत गेली.

१४ प्रतिवर्षी शलमोनाकडे सोनें येई तें सहाशें
सहासष्ट किक्कार भरे; १५ याखेरीज आणखी सौदागर,
देवघेव करणारे व्यापारी, निरनिराळ्या लोकांचे राजे
व देशांचे सुभेदार यांच्याकडून सोनें येई तें
निराळेंच. १६ शलमोन राजानें सोन्याचे पत्रे ठोकून
दोनशें मोठ्या ढाली बनविल्या, एकेका ढालीस सहाशें
शेकेल सोनें लागलें. १७ तसेंच त्यानें सोन्याचे पत्रे
ठोकून तीनशें लहान ढाली केल्या; प्रत्येक लहान
ढालीस तीन माने (शेर) सोनें लागलें; राजानें या
ढाली लबानोन येथील वनगृहांत ठेविल्या. १८ राजानें
एक मोठें हस्तिदंती सिंहासन बनविलें, व तें उत्तम
सोन्यानें मढविलें. १९ सिंहासनास सहा पायऱ्या
होत्या; आसनाचें ओठंगण वरून गोलाकार होतें;
सिंहासनाच्या दोन्ही बाजूंस हात होते व त्या दोन
हातांच्या बाजूला दोन सिंह केले होते. २० त्या
सहा पायऱ्यांच्या दोन्ही बाजूंस एकेक असे एकंदर
बारा सिंह केले होते; दुसऱ्या कोणत्याहि राज्यांत
यासारखें केलेलें सिंहासन नव्हतें. २१ शलमोन
राजाचीं सर्व पानपात्रें सोन्याचीं होतीं; लबानोन येथील
वनगृहांतील सर्व पात्रें शुद्ध सोन्याचीं होतीं; चांदीचें
एकहि नव्हतें; शलमोनाच्या वेळीं चांदीला कोणी
विचारीत नव्हतें. २२ समुद्रावर हिरामाच्या जहाजां-
बरोबर राजाच्याहि तार्शीश जहाजांचा एक तांडा
असे, आणि तीन तीन वर्षांनीं हीं तार्शीश जहाजें
सोनें, चांदी, हस्तिदंत, वानर व मोर आणीत असत.
२३ शलमोन राजा धन व शहाणपण या बाबतींत
पृथ्वीवरल्या सर्व राजांहून श्रेष्ठ होता. २४ देवानें
शलमोनाच्या ठायीं शहाणपण ठेविलें होतें तें ऐकण्यास
अखिल पृथ्वीवरले लोक त्याच्या दर्शनास येत.
२५ प्रत्येक मनुष्य चांदीचीं व सोन्याचीं पात्रें, उंची
वस्त्रें, शस्त्रें, सुगंधी द्रव्यें, घोडे व खेचरें यांचा
नजराणा वर्षानुवर्ष आणीत असे. २६ शलमोनानें
रथ व राऊत यांचा संग्रह केला; त्याच्यापाशीं चौदाशें
रथ व बारा हजार राऊत झाले; त्यांतले कांहीं रथ
ठेवावयाच्या नगरांत व कांहीं यरुशलेमांत आपल्या-
जवळ त्यानें ठेविले. २७ राजानें यरुशलेमांत चांदी धोंड्या-
प्रमाणें आणि गंधसरू तळवटींतल्या उंबराच्या झाडां-
प्रमाणें विपुल केले. २८ शलमोनाचे घोडे मिसर देशांतून
येत; राजाचे व्यापारी घोड्यांच्या एकाएका तांड्याची
किंमत ठरवून तांडेचे तांडे घेत; २९ एकेका रथास
सहाशें शेकेल चांदी व एकेका घोड्यास दीडशें शेकेल
चांदी देऊन ते मिसर देशाहून आणीत; हित्ती व
अरामी राजांसाठींहि असेंच ते व्यापारी आणीत.

११ १ शलमोन राजा फारोच्या कन्येशिवाय
आणखी मवाबी, अम्मोनी, अदोमी, सीदोनी
व हित्ती राष्ट्रांतल्या विदेशी स्त्रियांच्या नादीं

लागला; व त्यांतल्या स्त्रियांवर त्याचें प्रेम जडलें.
२ ह्या राष्ट्रांविषयीं परमेश्वरानें इस्राएल लोकांस
सांगितलें होतें कीं तुम्हीं त्यांच्याशीं व्यवहार करूं नये
व त्यांनीं तुमच्याशीं व्यवहार करूं नये, कारण ते
खात्रीनें तुमचीं मनें आपल्या देवांकडे वळवितील.
३ त्याच्या सातशें राण्या व तीनशें उपपत्नी होत्या;
त्याच्या बायकांनीं त्याचें मन बहकविलें. ४ शलमोन
म्हातारा झाला तेव्हां त्याच्या बायकांनीं त्याचें मन
अन्य देवांकडे वळविलें; त्याचा बाप दावीद याचें मन
परमेश्वराकडे पूर्णपणें असे त्याप्रमाणें त्याचें नसे.
५ सिदोन्यांची देवी अष्टोरेथ आणि अम्मोन्यांचें
अमंगळ दैवत मिलकोम यांच्या नादीं शलमोन लागला.
६ परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें शलमोनानें केलें;
त्याचा बाप दावीद याच्याप्रमाणें तो परमेश्वराला
पूर्णपणें अनुसरला नाहीं. ७ तेव्हां शलमोनानें यरुश-
लेमाच्या समोरील पहाडावर मवाबाचें अमंगळ दैवत
कमोश आणि अम्मोन्यांचें अमंगळ दैवत मोलख
यांच्यासाठीं एक एक उंच स्थान बांधिलें. ८ ज्या
विदेशी स्त्रिया आपआपल्या दैवतांस धूप दाखवीत व
यज्ञ करीत त्या सर्वांसाठीं त्यानें अशीच व्यवस्था केली.
९ शलमोनाचें मन इस्राएलाचा देव परमेश्वर याज-
कडून फिरलें म्हणून परमेश्वर त्याजवर कोपला; त्यास
त्याचें दोनदा दर्शन झालें होतें. १० त्यास या बाबतींत
अशी आज्ञा केली होती कीं अन्य देवांच्या नादीं लागूं
नको; पण परमेश्वरानें केलेली ही आज्ञा त्यानें पाळिली
नाहीं. ११ यास्तव परमेश्वर शलमोनास म्हणाला,
माझा करार व मीं तुला लावून दिलेले नियम न
पाळितां हें असें आचरण तूं केलें त्या अर्थी मी तुझें
राज्य तुजपासून तोडून घेऊन तुझ्या एका सेवकास
देईन; १२ पण तुझा बाप दावीद याच्याप्रीत्यर्थ
तुझ्या हयातींत मी असें करणार नाहीं; तर तुझ्या
पुत्राच्या हातून राज्य तोडून घेईन. १३ तरी मी
सगळेंच राज्य तोडून घेणार नाहीं; माझा सेवक दावीद
याच्याप्रीत्यर्थ व मीं निवडिलेल्या यरुशलेमाप्रीत्यर्थ
तुझ्या पुत्राच्या हातीं मी एक वंश राहूं देईन.

१४ परमेश्वरानें अदोमी राजवंशांतील अदोमी
हदाद हा शत्रु शलमोनावर उठविला. १५ दावीद
अदोमास असतां यवाब सेनापतीनें मृतांस मूठमाती
देण्यास जाऊन अदोमांतील एकूणएक पुरुषास मारून
टाकिलें होतें; १६ यवाब सर्व इस्राएल लोकांसह अदोमांत
सहा महिने राहिला असून तेवढ्या अवधींत त्यानें
अदोमांतल्या सर्व पुरुषांची कत्तल उडविली. १७ तेव्हां
हदाद लहान मुलगा होता तो आपल्या बापाच्या कांहीं
अदोमी सेवकांबरोबर मिसर देशास जाण्याच्या इराद्यानें
पळाला. १८ ते मिद्यानांतून जाऊन पारानास आले
आणि पारानांतून कांहीं लोक बरोबर घेऊन मिसर
देशीं फारो राजाकडे गेले; फारोनें त्यांस राहावयास
घर दिलें, त्यांच्या खाण्यापिण्याची तरतूद केली व
त्यांस कांहीं जमीनहि दिली. १९ हदादानें फारोची
चांगली मर्जी संपादिली म्हणून फारोनें त्यास आपली
मेहुणी, आपली राणी तहपनेस हिची बहीण, दिली.
२० तहपनेस राणीच्या बहिणीच्या पोटीं त्यास गनुबथ
नांवाचा पुत्र झाला; तहपनेस हिनें फारोच्या वाड्यांत
त्या मुलाच्या थानमोडीचा समारंभ केला; तेव्हांपासून
गनुबथ फारोच्या वाड्यांत त्याच्या पुत्रांबरोबर राहिला.
२१ दावीद आपल्या वडिलांस जाऊन मिळाला आणि
यवाब सेनापतिहि मृत्यु पावला हें हदादास मिसर देशांत
कळलें तेव्हां तो फारोस म्हणाला, मला स्वदेशीं जाव-
याचें आहे, माझी रवानगी करा. २२ फारो त्यास
म्हणाला, तूं मजपाशीं असतां तुला काय उणें आहे?
तूं स्वदेशीं कां जाऊं पाहतोस? तो फारोस म्हणाला,
कांहीं नाहीं, पण माझी रवानगी कराच.

२३ देवानें शलमोनावर दुसरा एक शत्रु उठविला,
त्याचें नांव एल्यादाचा पुत्र रजोन; तो आपला धनी
सोबाचा राजा हददेजर याच्यापासून पळून गेला होता;
२४ दाविदानें सोबा येथील रहिवाश्यांचा संहार केला
तेव्हां रजोन आपल्यापाशीं कांहीं लोक जमवून त्यांचा
सेनापति झाला; ते दिमिष्क येथें राहिले आणि तेथें
त्यांनीं राज्य स्थापिलें, २५ हदादानेंच केवळ इस्राएलास
उपद्रव दिला नाहीं तर रजोनानेंहि शलमोनाच्या

सगळ्या हयातींत इस्राएलाशीं वैर केलें; आणि त्यानें इस्राएलाचा तिटकारा केला व अरामावर राज्य केलें.

२६ याशिवाय सरेदा येथला एफ्राइमी नबाट याचा पुत्र यराबाम हा शलमोनाचा सेवक होता, त्याची आई विधवा होती, तिचें नांव सरूवा; त्यानेंहि राजावर हात उचलिला. २७ त्यानें हात उचलावयाचें कारण एवढेंच कीं शलमोन मिल्लो नगर बांधून आपला बाप दावीद याच्या नगराची मोडतोड दुरुस्त करीत होता; २८ त्या वेळीं यराबाम हा मोठा शूर वीर होता. तो तरुण पुरुष उद्योगी आहे हें शलमोनाच्या लक्षांत आलें तेव्हां त्यानें त्यास योसेफाच्या घराण्यांतील लोकांच्या कामावर नेमिलें, २९ एके समयीं यराबाम यरुशलेम सोडून बाहेर चालला असतां त्याला वाटेंत शिलोचा अहीया नामक संदेष्टा भेटला; त्यानें नवें वस्त्र धारण केलें होतें, व त्या वेळीं त्या मैदानांत ते दोघेच होते. ३० अहीयानें आपल्या अंगावरचें नवें वस्त्र काढून त्याचे बारा तुकडे केले. ३१ तो यराबामास म्हणाला, यांतले दहा तुकडे तूं घे, कारण इस्राएलाचा देव परमेश्वर याचें असें म्हणणें आहे कीं मी शलमोनाच्या हातून राज्य तोडून घेऊन दहा वंश तुझ्या हातीं देईन; ३२ (तरी माझा सेवक दावीद याच्याप्रीत्यर्थ आणि इस्राएलाच्या सर्व वंशांतून मीं निवडलेल्या यरुशलेम नगराप्रीत्यर्थ त्याजकडे मी एक वंश राहूं देईन;) ३३ याचें कारण हेंच कीं ते माझा त्याग करून सिदोन्यांची देवी अष्टोरेथ, मवाबाचा देव कमोश आणि अम्मोन्यांचा देव मिलकोम यांच्या भजनीं लागले आहेत; ते माझ्या मार्गानें चालत नाहींत, जें माझ्या दृष्टीनें योग्य तें करीत नाहींत आणि शलमोनाचा बाप दावीद माझे नियम व निर्णय पाळी तसे पाळीत नाहींत; ३४ तथापि मी त्याच्या हातून सर्वच राज्य हिसकावून घेणार नाहीं; तर माझा सेवक दावीद माझ्या आज्ञा व नियम पाळीत असे म्हणून मीं त्याला निवडिलें होतें त्याच्याप्रीत्यर्थ मी शलमोनास त्याच्या हयातींत राजपदावर ठेवीन; ३५ पण त्याच्या पुत्राच्या हातून राज्य घेऊन तुला देईन, दहा वंशांवरलें राज्य तुला देईन; ३६ आणि त्याच्या पुत्राकडे मी एक वंश राहूं देईन; म्हणजे माझ्या नामाची स्थापना व्हावी म्हणून मीं यरुशलेम नगर निवडिलें आहे त्यांत माझा सेवक दावीद याची ज्योति मजसमोर निरंतर जळत राहील. ३७ मी तुला हातीं धरीन आणि तूं आपल्या मनोरथाप्रमाणें इस्राएलावर राज्य करिशील. ३८ तूं माझा सेवक दावीद याच्याप्रमाणें माझ्या सर्व आज्ञा मानिशील, माझ्या मार्गानें चालशील, माझ्या दृष्टीनें जें योग्य तेंच करिशील आणि माझे नियम व आज्ञा पाळीत जाशील तर मी तुझ्याबरोबर राहीन आणि जसें मीं दाविदाचें घराणें कायम स्थापिलें तसें तुझेंहि कायम स्थापीन आणि इस्राएल लोकांस तुझ्या हवालीं करीन. ३९ शलमोनाच्या वर्तनास्तव मी दाविदाच्या संततीस दुःख भोगावयास लावीन, पण तें सर्वकाळ नाहीं. ४० शलमोन यराबामास जिवें मारूं पाहत होता; पण यराबाम मिसर देशचा राजा शिशक याजकडे मिसर देशास पळून गेला आणि शलमोनाच्या मृत्यूपर्यंत तेथेंच राहिला.

४१ शलमोनाचा इतर सर्व इतिहास, त्याचीं सर्व कृत्यें व त्याचें शहाणपण यांचें वर्णन शलमोनाच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय? ४२ शलमोनानें यरुशलेमांत सर्व इस्राएलांवर एकंदर चाळीस वर्षें राज्य केलें. ४३ शलमोन आपल्या पितरांजवळ जाऊन निजला व त्याचा बाप दावीद याच्या नगरांत त्याला मूठमाती देण्यांत आली; आणि त्याचा पुत्र रहबाम त्याच्या जागीं राजा झाला.

**१२** १ रहबाम शखेमास गेला, कारण त्याला राजा करण्यासाठीं सर्व इस्राएल तेथें गेले होते. २ नबाटाचा पुत्र यराबाम हा शलमोन राजासमोरून पळून जाऊन मिसर देशांत राहिला होता, तेथें त्यानें हें ऐकलें; ३ आणि लोकांनीं त्याला बोलावून आणिलें; तेव्हां यराबाम व इस्राएलाची सर्व मंडळी रहबामाकडे येऊन म्हणाली, ४ आपल्या बापानें आमच्यावर जूं ठेविलें होतें तें भारी होतें; तर आतां

आपल्या बापानें आम्हांवर लादिलेलें कठिण दास्य व
भारी जूं हलकें करा म्हणजे आम्ही आपले ताबेदार
होऊं. ५ त्यानें त्यांस सांगितलें, आतां जा,
आणि तीन दिवसांनीं मजकडे परत या. हें ऐकून ते
गेले. ६ रहबाम राजानें आपला बाप शलमोन जीवंत
असतां जे वृद्ध मनुष्य त्याच्या पदरीं होते त्याचा
सल्ला घेतला; तो म्हणाला, या लोकांना उत्तर देण्याच्या
बाबतींत तुम्हीं मला काय मसलत देतां ? ७ ते त्यास
म्हणाले, आपण या लोकांचा सेवक होऊन त्यांची सेवा
कराल आणि त्यांना मधुर शब्दांनीं उत्तर द्याल तर
ते आपले सर्वकाळ सेवक होऊन राहतील. ८ ह्या वृद्ध
पुरुषांनीं दिलेला सल्ला रहबामानें टाकून त्याच्याबरो-
बर लहानाचे मोठे झालेले जे तरुण त्याच्या
पदरीं होते त्यांचा सल्ला घेतला. ९ त्यानें त्यांस
विचारिलें, आपल्या बापानें जें जूं आमच्यावर ठेविलें
आहे तें हलकें करा, असें म्हणणाऱ्या ह्या लोकांस
उत्तर देण्याच्या बाबतींत मला काय सल्ला देतां ?
१० त्याच्याबरोबर लहानाचे मोठे झालेल्या
त्या तरुणांनीं त्यास उत्तर दिलें, हे जे लोक आपल्याला
म्हणतात कीं आपल्या बापानें आम्हांवर भारी जूं
लादिलें होतें तर आतां आपण तें हलकें करा, त्यांस असें
सांगा कीं माझी करंगुळी माझ्या बापाच्या कमरेपेक्षां
मोठी आहे; ११ माझ्या बापानें तुमच्यावर भारी जूं
लादिलें तें मी आणखी भारी करणार; माझा
बाप तुम्हांस असुडांनीं ताडण करीत असे, तर
मी तुम्हांस विंचवांनीं ताडण करीन. १२ तिसऱ्या
दिवशीं मजकडे यावें असें राजानें सांगितलें
होतें, त्याप्रमाणें तिसऱ्या दिवशीं यराबाम व सगळे
लोक रहबामाकडे आले. १३ तेव्हां राजानें लोकांस
कठोरपणानें जबाब दिला आणि वृद्ध मनुष्यांनीं
दिलेला सल्ला टाकून, १४ त्या तरुणांच्या
सल्ल्याप्रमाणें तो त्यांस म्हणाला, माझ्या बापानें
तुमच्यावर भारी जूं लादिलें होतें, पण मी तें अधिक
भारी करणार; माझा बाप तुम्हांस असुडांनीं ताडण
करीत असे, मी तर तुम्हांला विंचवांनीं ताडण करीन.
१५ या प्रकारें राजानें लोकांचें ऐकलें नाहीं; याचें
कारण हेंच कीं जें वचन परमेश्वरानें शिलोकर
अहीया याच्या द्वारें नबाटाचा पुत्र यराबाम यास
दिलें होतें तें पूर्ण व्हावें अशी परमेश्वराची योजना
होती. १६ राजा ऐकत नाहीं हें पाहून सगळ्या
इस्राएल लोकांनीं त्याला म्हटलें, दाविदाचें आम्ही
काय लागतों ? इशायाचा पुत्र आमचा वतनभाग
नाहीं; हे इस्राएला, आपल्या डेऱ्यांकडे चालता हो;
दाविदा, आतां तूं आपलें घर संभाळ. मग इस्राएल
लोक आपल्या डेऱ्यांस चालते झाले. १७ जे इस्राएल
लोक यहूदाच्या नगरांत वस्ती करून राहिले होते
त्यांजवर मात्र रहबामानें राज्य केलें. १८ रहबाम
राजानें वेठीस लाविलेल्या लोकांची देखरेख करणारा
अदोराम यास पाठविलें; त्यास सर्व इस्राएल लोकांनीं
दगडमार करून ठार केलें. इकडे रहबाम राजा त्वरेनें
आपल्या रथांत बसून यरुशलेमास पळून गेला.
१९ या प्रकारें इस्राएल लोकांनीं दाविदाच्या
घराण्याशीं फितुरी केली ती आजवर चालू आहे.
२० यराबाम परत आला हें सर्व इस्राएलांनीं ऐकलें
तेव्हां त्यांनीं त्यास बोलावणें पाठवून सभेस आणिलें
व सर्व इस्राएलांवर राजा केलें; यहूदाचा वंश
खेरीज करून दाविदाच्या घराण्यास कोणी धरून
राहिला नाहीं.

२१ यरुशलेमास आल्यावर रहबामानें यहूदाचें
सर्व घराणें व बन्यामिनाचा वंश यांतून एकंदर एक
लाख ऐशीं हजार निवडक योद्धे जमा केले; इस्राएल
घराण्याशीं लढाई करून शलमोनाचा पुत्र रहबाम
याच्या हातीं राज्य परत यावें असा हेतु होता.
२२ तेव्हां परमेश्वराचें वचन देवाचा माणूस शमाया
यास असें आलें कीं २३ यहूदाचा राजा शलमोनपुत्र
रहबाम, यहूदा व बन्यामीन यांचें सगळें घराणें यांस
व इतर सर्व लोकांस असें सांग, २४ परमेश्वर
म्हणतो, आपले बांधव इस्राएल यांजवर स्वारी करून
लढूं नका; तुम्ही सर्व आपआपल्या घरीं परत जा;
कारण ही माझी करणी आहे. त्यांनीं परमेश्वराचें हें

वचन ऐकलें व त्याप्रमाणें ते सगळे परत चालते झाले.
२५ यराबाम एफ्राइमाच्या पहाडी प्रदेशांत
शखेम नगर मजबूत करून तेथें राहूं लागला आणि
त्यानंतर तेथून निघून जाऊन पनुएल नगराची
त्यानें मजबुती केली. २६ यराबाम आपल्या मनांत
म्हणाला कीं हें राज्य दाविदाच्या घराण्याकडे
जाण्याचा संभव आहे; २७ लोक यरुशलेमांत यज्ञ
करावयास गेले तर त्यांचा स्वामी यहूदाचा राजा
रहबाम याच्याकडे त्यांचें मन वळेल व ते मला जिवें
मारून यहूदाचा राजा रहबाम याचे पुनः होतील.
२८ राजानें आपल्याबरोबरच्या लोकांचा सल्ला घेऊन
सोन्याचीं दोन वासरें केलीं आणि लोकांस म्हटलें,
आजवर तुमचें यरुशलेमास जाणें झालें तेवढें पुरे;
हे इस्राएला, ज्या देवांनीं तुला मिसर देशांतून आणिलें
तेच हे पाहा. २९ त्यानें एका वासराची बेथेल येथें
व दुसऱ्याची दान येथें स्थापना केली. ३० ही गोष्ट
पापास कारण झाली; दानापर्यंतचे लोक त्यांपैकीं
एका वासराच्या दर्शनास जाऊं लागले. ३१ त्यानें
उच्चस्थानीं मंदिरें बांधिलीं, आणि सर्व लोकांतून याजक
नेमिले; ते लेवीचे वंशज नव्हते. ३२ मग यराबामानें
आठव्या महिन्याच्या पंधराव्या दिवशीं यहूदांतील
सणासारखा एक सण केला आणि वेदीवर होमबलि
अर्पिले; त्याप्रमाणें त्यानें बेथेल येथें आपण केलेल्या
वासरांप्रीत्यर्थ यज्ञ केले, आणि आपण केलेल्या उच्च-
स्थानांच्या याजकांस बेथेल येथें ठेविलें. ३३ जी वेदी
त्यानें बेथेलांत बांधली होती तीवर स्वतःच्याच मनानें
ठरविलेल्या आठव्या महिन्याच्या पंधराव्या दिवशीं
त्यानें होमबलि अर्पिले; त्यानें इस्राएल लोकांसाठीं
हा सण स्थापिला आणि वेदीवर यज्ञबलि हवन
करून अर्पिला.

१ नंतर पाहा, परमेश्वराच्या आज्ञेवरून
**१३** देवाचा माणूस यहूदांतून बेथेल येथें आला; त्या
समयीं यराबाम हवन करीत वेदीपाशीं उभा
होता. २ परमेश्वराच्या आज्ञेवरून त्यानें त्या वेदीविरुद्ध
हे शब्द उच्चारिले: हे वेदी, हे वेदी, परमेश्वर म्हणतो,
पाहा, दाविदाच्या घराण्यांत योशीया नांवाचा एक
पुत्र जन्मेल; जे उच्चस्थानांचे याजक तुजवर होम-
हवन करितात त्यांचा तो तुझ्यावर यज्ञ करील, मान-
वांच्या अस्थि तुझ्यावर जाळील. ३ त्याच दिवशीं त्यानें
खूण दिली; तो म्हणाला, परमेश्वरानें सांगितलेली खूण
हीच; पाहा, ही वेदी भंग पावेल आणि तीवरील राख
उधळली जाईल. ४ देवाच्या माणसानें बेथेलांतल्या त्या
वेदीविरुद्ध जे हे शब्द उच्चारिले ते राजा यराबाम यानें
ऐकले तेव्हां तो आपला हात वेदीवरून काढून पुढें करून
म्हणाला, त्याला धरा. तेव्हां त्यानें जो हात त्याजकडे
केला होता तो वाळून गेला व तो त्यास मागें घेतां
येईना. ५ परमेश्वराच्या आज्ञेवरून देवाच्या माणसानें
दिलेल्या खुणेप्रमाणें ती वेदी भंग पावली व तीवरील
राख वेदीवरून उधळली गेली. ६ राजानें त्या देवाच्या
माणसास विनंति केली कीं माझा हात पुनः पूर्ववत्
व्हावा म्हणून देव परमेश्वर याजकडे मजसाठीं
प्रार्थना करून त्याचा कृपाप्रसाद माग. देवाच्या
माणसानें परमेश्वराची विनवणी केली तेव्हां राजाचा
हात पुनः पूर्वस्थितीवर आला; तो पूर्वी होता तसा झाला.
७ राजा त्या देवाच्या माणसास म्हणाला, मजबरोबर
घरीं चल आणि कांहीं उपाहार करून ताजातवाना हो,
मी तुला कांहीं इनाम देतों. ८ देवाचा माणूस राजास
म्हणाला, तूं मला आपलें अर्धें घर देशील तरी मी
तुझ्या येथें येणार नाहीं; या ठिकाणीं मी अन्नपाणी
सेवन करणार नाहीं; ९ परमेश्वराच्या वचनाच्या द्वारें
मला अशी आज्ञा झाली आहे कीं तूं अन्नपाणी सेवन
करूं नको आणि ज्या वाटेनें जाशील तिनें परत
येऊं नको. १० ज्या वाटेनें तो बेथेलास गेला होता त्या
वाटेनें न जातां दुसऱ्या वाटेनें तो गेला.

११ बेथेल येथें त्या काळीं एक वृद्ध संदेष्टा राहत
असे; त्याच्या एका पुत्रानें येऊन देवाच्या माणसानें त्या
दिवशीं बेथेलास जें कांहीं केलें त्याची सगळी हकीकत
आपल्या बापास कळविली; राजास जे शब्द तो बोलला तेहि
त्याच्या पुत्रांनीं आपल्या बापास निवेदन केले.
१२ त्याच्या बापानें त्यास विचारिलें, तो कोणत्या वाटेनें

गेला ? यहूदांतून आलेला तो देवाचा माणूस कोणत्या
वाटेनें गेला हें त्यांनीं पाहिलें होतें. १३ तो आपल्या
मुलांस म्हणाला, गाढवावर खोगीर घाला. त्यांनीं गाढवा-
वर खोगीर घातल्यावर तो त्यावर बसला. १४ तो
देवाच्या माणसाच्या पाठोपाठ गेला. तो त्यास एका
एला झाडाखालीं बसलेला आढळला. त्यानें त्यास विचा-
रिलें, यहूदाहून आलेला देवाचा माणूस तूंच काय ? तो
म्हणाला, मीच. १५ तो त्यास म्हणाला, मजबरोबर
घरीं चल आणि भोजन कर. १६ तो म्हणाला, मला
तुजबरोबर परत येतां येत नाहीं; तुझ्या येथें मला जातां
येत नाहीं; मी या ठिकाणीं अन्नपाणी सेवन करणार नाहीं;
१७ कारण परमेश्वराच्या वचनाच्या द्वारें मला अशी आज्ञा
झाली आहे कीं तूं त्या ठिकाणीं अन्नपाणी सेवन करूं नको
आणि ज्या वाटेनें जाशील त्या वाटेनें परत येऊं नको.
१८ तेव्हां तो त्यास म्हणाला, मीहि तुझ्यासारखाच
संदेष्टा आहें; परमेश्वराच्या आज्ञेवरून एक देवदूत मला
म्हणाला, त्याला परत आपल्या घरीं घेऊन ये,
म्हणजे तो अन्नपाणी सेवन करील; पण हें त्याचें
सांगणें खोटें होतें. १९ त्यानें त्याजबरोबर परत
जाऊन त्याच्या घरीं अन्नपाणी सेवन केलें. २० ते
भोजनास बसले असतां त्यास परत आणणाऱ्या त्या
संदेष्ट्यास परमेश्वराचें वचन प्राप्त झालें; २१ यहूदा-
हून आलेल्या देवाच्या माणसास त्यानें मोठ्यानें सांगि-
तलें, परमेश्वर असें म्हणतो, परमेश्वराच्या तोंडचें
वचन तूं अवमानिलें, आणि तुझा देव परमेश्वर यानें
तुला आज्ञा केली ती तूं पाळिली नाहीं. २२ तूं
परत आलास आणि ज्या ठिकाणीं अन्नपाणी सेवूं नको
असें तुला सांगितलें होतें तेथें तूं अन्नपाणी सेविलें,
यास्तव तुझें प्रेत तुझ्या वाडवडिलांच्या थडग्यांत
जाणार नाहीं. २३ त्याचें खाणेंपिणें आटोपल्यावर
त्यानें त्या माघारीं आणिलेल्या संदेष्ट्यासाठीं गाढवावर
खोगीर घातलें. २४ तेथून निघून तो चालला असतां
वाटेंत त्यास एका सिंहानें गांठून मारून टाकिलें; त्याचें
प्रेत वाटेंत तसेंच पडून राहिलें आणि तो गाढव
त्याच्यापाशीं उभा राहिला, आणि सिंहहि त्या प्रेता-
जवळ उभा राहिला. २५ तिकडून जाणाऱ्यायेणाऱ्या
लोकांनीं वाटेंत पडलेलें तें प्रेत व त्याच्यापाशीं उभा
राहिलेला तो सिंह पाहिला; आणि त्यांनीं तो वृद्ध
संदेष्टा राहत होता त्या नगरांत जाऊन हें वर्तमान
कळविलें. २६ त्याला वाटेवरून परत आणणाऱ्या त्या
संदेष्ट्यानें हें ऐकलें तेव्हां तो म्हणाला, परमेश्वराच्या
तोंडचें वचन अवमानणारा देवाचा माणूस तो हाच,
म्हणूनच परमेश्वरानें त्यास सिंहाच्या स्वाधीन केलें
आणि परमेश्वरानें त्यास सांगितलेल्या वचनाप्रमाणें
सिंहानें त्यास फाडून ठार केलें असावें. २७ तो
आपल्या पुत्रांस म्हणाला, माझ्या गाढवावर खोगीर
घाला; तेव्हां त्यांनीं खोगीर घातलें. २८ त्यानें तेथें
जाऊन पाहिलें तों त्याचें प्रेत वाटेवर पडलें आहे
आणि त्याच्यापाशीं गाढव व सिंह उभे आहेत असें
याच्या दृष्टीस पडलें; सिंहानें त्याचें प्रेत खाऊन
टाकिलें नव्हतें आणि त्या गाढवास फाडून टाकिलें
नव्हतें. २९ त्या संदेष्ट्यानें देवाच्या माणसाचें प्रेत
उचलून गाढवावर घालून परत आणिलें; त्याच्या-
बद्दल विलाप करावा व त्यास मूठमाती द्यावी म्हणून
तो आपल्या नगरास परत आला. ३० त्यानें त्याचें
प्रेत आपल्याच थडग्यांत ठेविलें आणि, अरेरे, माझ्या
बंधो ! असें ओरडून लोकांनीं त्याच्याबद्दल विलाप केला.
३१ त्याला मूठमाती दिल्यावर त्यानें आपल्या पुत्रांस
सांगून ठेविलें कीं मी मेल्यावर देवाच्या माणसाला ज्या
थडग्यांत पुरिलें आहे तेथेंच मला मूठमाती द्या आणि
त्याच्या अस्थींनजीक माझ्या अस्थि ठेवा; ३२ कारण
बेथेलांतली वेदी आणि शमरोनी नगरांतल्या उच्चस्थानां-
वरील सर्व मंदिरांविरुद्ध जे उद्गार त्यानें परमेश्वराच्या
वचनानुसार काढिले तदनुसार अवश्य घडून येणार.

३३ एवढें झालें तरी यराबामानें आपला दुष्ट
मार्ग सोडिला नाहीं; त्यानें उच्चस्थानांचे याजक
सगळ्या लोकांतून नेमिले; आपण उच्चस्थानांचे
याजक व्हावें असें ज्यांच्या इच्छेस आलें त्यास त्यानें

संस्कार केला. ३४ या गोष्टीनें यराबामाच्या घराण्यास
पाप लागलें व तेणेंकरून त्याचा उच्छेद झाला आणि
भूतलावरून तें नष्ट झालें.

१४ १ त्या समयीं यराबामाचा पुत्र अबीया
आजारी पडला. २ तेव्हां यराबाम आपल्या
स्त्रीस म्हणाला, चल, तूं यराबामाची स्त्री आहेस हें
कोणास ओळखितां येणार नाहीं अशा प्रकारें वेश पालट
आणि शिलो येथें जा; जो मजविषयीं बोलला होता कीं
मी या लोकांचा राजा होईन तो अहीया संदेष्टा येथें
राहतो. ३ तूं दहा भाकरी, पुऱ्या व मधाची कुपी
बरोबर घेऊन त्याजकडे जा; मुलाचें काय होईल तें तो
तुला सांगेल. ४ यराबामाच्या स्त्रीनें तसें केलें. ती
निघून शिलोस अहीयाच्या घरीं गेली. अहीयास
दिसत नव्हतें; कारण वृद्धपणामुळें त्याची दृष्टि मंद
झाली होती. ५ परमेश्वर अहीयास म्हणाला,
यराबामाची स्त्री आपल्या मुलाविषयीं विचारण्याकरितां
येत आहे; तो आजारी आहे; तूं तिला असें असें सांग;
आपण कोणी दुसरी स्त्री आहों असें सोंग करून
ती आंत येईल. ६ ती दारापाशीं येत असतां तिच्या
पावलांचा आवाज ऐकून अहीया तिला म्हणाला,
यराबामाच्या स्त्रिये, आंत ये; आपण दुसरीच कोणी
आहों असें सोंग तूं कां करितेस ? तुला कांहीं दुःखाचा
संदेश सांगणें मला प्राप्त झालें आहे. ७ जा, यराबामास
सांग, इस्राएलाचा देव परमेश्वर म्हणतो कीं मीं
तुला लोकांतून निवडून उन्नत केलें, माझे लोक
इस्राएल यांचा तुला मीं नायक नेमिलें, ८ आणि दावीद
घराण्यापासून राज्य काढून घेऊन तुला दिलें; तरी तूं
माझा सेवक दावीद याच्याप्रमाणें वागला नाहींस;
दावीद माझ्या आज्ञा पाळीत असे; तो मला जिवेंभावें
धरून राहिला व माझ्या दृष्टीनें जें योग्य तेंच
तो करीत असे; ९ पण तुझ्यापूर्वी होऊन गेलेल्या
सर्वांपेक्षां तूं अधिक दुराचरण केलें आहे; मला सोडून
तूं अन्य देव व ओतींव मूर्ति केल्या आहेत; अशानें
तूं मला चिडवून संतप्त केलें आहे आणि मजकडे
पाठ केली आहे. १० यास्तव पाहा, मीं यराबामाच्या
घराण्यावर अरिष्ट आणीन, यराबामाच्या घराण्यांतल्या
प्रत्येक पुरुषाचा मी उच्छेद करीन, मग तो इस्राएला-
च्या बंदींत असो कीं मोकळा असो; ज्याप्रमाणें शेण
अगदीं साफ निघून जाईपर्यंत काढून टाकितात
त्याप्रमाणें मी यराबामाचें घराणें काढून टाकीन.
११ यराबामाच्या घराण्यांतला जो कोणी नगरांत
मरेल त्याला कुत्रीं खातील व जो कोणी रानावनांत
मरेल त्याला आकाशांतलीं पाखरें खाऊन टाकितील,
कारण परमेश्वर हें बोलला आहे. १२ तर आतां ऊठ,
आपल्या घरीं जा; तुझे पाय नगरांत पडतांच तुझें
मूल मरेल; १३ सर्व इस्राएल त्यासाठीं शोक करून
त्याला पुरितील; यराबामाच्या घराण्यांत त्यालाच
कायती मूठमाती मिळेल, कारण इस्राएलाचा देव
परमेश्वर याच्यासंबंधानें यराबामाच्या घराण्यांत
त्याच्याच ठायीं कांहींसा चांगुलपणा दिसून आला आहे.
१४ मग परमेश्वर इस्राएलावर असा राजा स्थापील
कीं तो त्याच दिवशीं यराबामाच्या घराण्याचा उच्छेद
करील. मी काय म्हणतों ? आतांच तो स्थापिला आहे.
१५ बोरू पाण्यांत कांपतो त्याप्रमाणें परमेश्वर इस्रा-
एलास हाणून कांपवील व जी उत्तम भूमि त्यानें
त्यांच्या पूर्वजांस दिली होती तींतून त्यांस उपटून
काढून नदीपलीकडे त्यांची पांगापांग करील, कारण
त्यांनीं अशेरा मूर्ति बनवून परमेश्वरास संतप्त केलें.
१६ यराबामानें जीं पातकें स्वतः केलीं व इस्राएलाकडून
करविलीं त्यामुळें परमेश्वर इस्राएलाचा त्याग करील.
१७ यराबामाची बायको निघून तिरसा येथें आली;
तिचा पाय घराच्या उंबरठ्यास लागतांच मूल मेलें.
१८ परमेश्वरानें आपला सेवक अहीया संदेष्टा याच्या द्वारें
जें वचन कळविलें होतें तदनुसार सर्व इस्राएलानें त्याला
मूठमाती दिली व त्याजसाठीं शोक केला. १९ यराबा-
मानें इतर कोणत्या गोष्टी केल्या, युद्ध कसें केलें व
राज्य कसें चालविलें या सर्वांचें वर्णन इस्राएलाच्या
राजांच्या बखरींत केलें आहे. २० यराबाम बावीस वर्षें
राज्य करून आपल्या पितरांजवळ जाऊन निजला व
त्याचा पुत्र नादाब हा त्याच्या जागीं राजा झाला.

२१ इकडे शलमोनाचा पुत्र रहबाम हा यहूदावर
राज्य करीत होता. रहबाम राज्य करूं लागला तेव्हां तो
एकेचाळीस वर्षांचा होता; आपल्या नामाची स्थापना
करावी म्हणून परमेश्वरानें सर्व इस्राएल वंशांतून यरु-
शलेम नगर निवडलें तेथें त्यानें सतरा वर्षे राज्य
केलें; त्याच्या आईचें नांव नामा; ती अम्मोनीण होती.
२२ परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें यहूदाचे लोक
करूं लागले; त्यांच्या पूर्वजांपेक्षांहि त्यांनीं जीं अधिक
पातकें केलीं त्यामुळें त्यांनीं परमेश्वरास ईर्ष्येस पेटविलें.
२३ त्यांनीं प्रत्येक उंच टेकडीवर, प्रत्येक हिरव्या
झाडाखालीं उच्चस्थानें, स्तंभ आणि अशेरा मूर्ति
स्थापिल्या; २४ त्या देशांत पुरुषगामीहि होते; ज्या
सर्व राष्ट्रांस परमेश्वरानें इस्राएलासमोरून हाकून दिलें
होतें त्यांच्या अमंगळ कर्मांप्रमाणें हे करूं लागले.
२५ रहबाम राजाच्या कारकीर्दीच्या पांचव्या वर्षी
मिसर देशचा राजा शिशक यानें यरुशलेमावर स्वारी
केली. २६ त्यानें परमेश्वराच्या मंदिरांतील व राज-
वाड्यांतील सर्व भांडार लुटून नेलें; शलमोन राजानें
ज्या सोन्याच्या ढाली केल्या होत्या त्याहि त्यानें नेल्या.
२७ रहबाम राजानें त्यांच्याऐवजीं पितळेच्या
ढाली बनविल्या आणि राजाच्या स्वारीपुढें धावणाऱ्यांच्या
व राजवाड्याची रखवाली करीत असणाऱ्यांच्या स्वाधीन
त्या केल्या. २८ राजा परमेश्वराच्या मंदिरांत जात
असे तेव्हां हे धावणारे त्या ढाली घेऊन पुढें चालत
आणि मग त्या आपल्या चाकींत आणून ठेवीत.
२९ यराबामानें केलेल्या इतर गोष्टींचें व जें जें कांहीं
त्यानें केलें त्यांचें वर्णन यहूदाच्या राजांच्या बखरींत
केलें आहे, नाहीं काय? ३० रहबाम व यराबाम यांच्या-
मध्यें लढाई सतत चालू होती. ३१ रहबाम आपल्या
पितरांजवळ जाऊन निजला, व त्यांनीं त्यास दावीद-
पुरांत त्याच्या पितरांच्या कबरस्तानांत मूठमाती दिली;
त्याच्या आईचें नांव नामा, ती अम्मोनीण होती.
त्याचा पुत्र अबीयाम[1] हा त्याच्या जागीं राजा झाला.

**१५** १ नबाटाचा पुत्र यराबाम याच्या कार-
कीर्दीच्या अठराव्या वर्षी अबीयाम यहूदावर राज्य
करूं लागला. २ त्यानें तीन वर्षे यरुशलेमांत
राज्य केलें; त्याच्या आईचें नांव माका, ती अबीशा-
लोमाची कन्या. ३ त्याच्या अगोदर त्याच्या बापानें
जीं पातकें केलीं त्या सर्व पातकांचें अनुकरण त्यानें
केलें; त्याचा पूर्वज दावीद याचें चित्त त्याचा देव
परमेश्वर याजकडे जसें पूर्णपणें होतें तसें त्याचें नव्हतें.
४ तथापि दाविदाकरितां त्याचा देव परमेश्वर यानें त्याचा
दीप यरुशलेमांत कायम राहूं दिला; त्याच्या पश्चात्
त्याच्या पुत्राची स्थापना त्यानें केली; आणि यरुशलेम
नगर सुस्थितींत ठेविलें; ५ कारण दावीद परमे-
श्वराच्या दृष्टीनें जें योग्य तें करीत असे आणि उरीया
हित्ती याचें प्रकरण खेरीज करून तो आपल्या आयुष्य-
भर परमेश्वरानें केलेली कोणतीहि आज्ञा सोडून
बहकला नाहीं. ६ अबीयामाच्या सगळ्या हयातींत
अबीयाम व यराबाम यांच्यामधली लढाई चालू राहिली.
७ अबीयामानें केलेल्या इतर गोष्टींचें व जें कांहीं त्यानें
केलें त्या सर्वांचें वर्णन यहूदाच्या राजांच्या बखरींत
केलें आहे; नाहीं काय? अबीयाम व यराबाम यांची
लढाई चालूच होती. ८ अबीयाम आपल्या पितरांजवळ
जाऊन निजला व त्यास त्यांनीं दावीदपुरांत मूठमाती दिली;
त्याचा पुत्र आसा हा त्याच्या जागीं राजा झाला.

९ इस्राएलाचा राजा यराबाम याच्या कारकीर्दीच्या
विसाव्या वर्षी आसा यहूदावर राज्य करूं लागला.
१० त्यानें एकेचाळीस वर्षे यरुशलेमांत राज्य केलें.
त्याच्या आईचें नांव माका; ही अबीशालोमाची कन्या.
११ आसानें आपला पूर्वज दावीद याच्याप्रमाणें
परमेश्वराच्या दृष्टीनें जें योग्य तें केलें. १२ त्यानें
पुरुषगमन करणाऱ्यांस देशांतून घालवून दिलें आणि
त्याच्या वाडवडिलांनीं केलेल्या एकंदर मूर्ति टाकून
दिल्या. १३ त्यानें आपली आई माका हिला राज-
मातेच्या पदावरून दूर केलें, कारण तिनें अशेराप्रीत्यर्थ
एक अमंगळ मूर्ति केली होती; तिनें केलेली ती

१. २ इतिहास १२ : १६ एथें अबीया.

१ पाठभेद: रहबाम

मूर्ति आसानें फोडूनतोडून किद्रोन ओहळाजवळ जाळून टाकिली. १४ त्यानें उच्चस्थानें मोडून टाकिलीं नाहींत; तथापि आसाचें मन साऱ्या हयातींत परमेश्वराकडे पूर्णपणें लागलेलें होतें. १५ त्याच्या बापानें व त्यानें स्वतः सोनें, चांदी व पात्रें परमेश्वरास वाहिलीं होतीं तीं सर्व त्यानें परमेश्वराच्या मंदिरांत नेऊन ठेविलीं. १६ आसा व इस्राएलाचा राजा बाशा यांच्यामध्यें आमरण लढाई चालली होती. १७ इस्राएलाचा राजा बाशा यानें यहूदावर स्वारी केली; यहूदाचा राजा आसा याच्याकडे कोणाच्याहि येण्याजाण्याला प्रतिबंध व्हावा म्हणून इस्राएलाचा राजा बाशा यानें रामा नगराची मजबुती केली. १८ परमेश्वराच्या मंदिराच्या व राजवाड्याच्या भांडारांत सोनें व चांदी राहिली होती ती सर्व काढून आसानें आपल्या सेवकांच्या हातीं दिली व त्यांस दिमिष्कवासी अरामाचा राजा बेन-हदाद बिन टब्रिम्मोन बिन हेज्योन याजकडे पाठविलें; त्यानें त्याला असें सांगून पाठविलें कीं १९ माझ्या बापाचा व तुमच्या बापाचा सलोखा होता तसा तुमचा व आमचा सलोखा होवो; तर पाहा, मीं तुम्हांला सोन्याचांदीची भेट पाठविली आहे; इस्राएलाचा राजा बाशा याशीं केलेला करार तुम्ही मोडून टाका म्हणजे तो माझ्यामागें लागण्याचें सोडून देईल. २० आसा राजाचें हें बोलणें मान्य करून बेन-हदादानें आपल्या सेनांच्या सरदारांस इस्राएली नगरांवर स्वारी करावयास पाठविलें; त्यांनीं ईयोन, दान, आबेल-बेथ-माका, सगळा किन्नेरोथ व नफतालीचा सर्व प्रदेश जिंकिला. २१ हें ऐकून रामा शहराची मजबुती करण्याचें सोडून बाशा तिरसा येथें जाऊन राहिला. २२ मग आसा राजानें यहूदांतील सर्व लोकांस जाहीर केलें, कोणाला सोडिलें नाहीं; बाशानें जे पाषाण व लाकडें लावून रामाची मजबुती केली होती ती सर्व त्या लोकांनीं काढून नेलीं आणि आसा राजानें बन्यामिनाचा गिबा व मिस्पा यांची मजबुती करण्याच्या कामीं तीं लाविलीं. २३ आसानें केलेल्या बाकीच्या गोष्टी, त्याचा पराक्रम, त्यानें जें कांहीं केलें तें व त्यानें बांधिलेलीं नगरें या सर्वांचें वर्णन यहूदाच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय? शेवटीं वृद्धापकाळीं त्याच्या पायांला कांहीं विकार झाला. २४ आसा आपल्या पितरांजवळ निजला, व लोकांनीं त्यास त्याचा वडील दावीद याच्या नगरांत त्याच्या पितरांपाशीं मूठमाती दिली; आणि त्याचा पुत्र यहोशाफाट त्याच्या जागीं राजा झाला.

२५ यहूदाचा राजा आसा याच्या कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षी यराबामाचा पुत्र नादाब हा इस्राएलावर राज्य करूं लागला; इस्राएलावर त्यानें दोन वर्षें राज्य केलें. २६ परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें केलें; त्यानें आपल्या बापाचें अनुकरण केलें; त्याच्या बापानें इस्राएलाकडून जें पाप करविलें त्याच पापाच्या मार्गानें तोहि चालला. २७ त्याच्याविरुद्ध इस्साखार घराण्यांतील अहीयाचा पुत्र बाशा यानें फितुरी केली; बाशानें त्यास पलिष्ट्यांचें गिब्बथोन येथें ठार मारिलें; नादाब व सर्व इस्राएल यांनीं त्या समयीं गिब्बथोनास वेढा घातला होता. २८ यहूदाचा राजा आसा याच्या कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षी बाशानें नादाबास ठार मारिलें, व तो त्याच्या जागीं राजा झाला. २९ राजा होतांच त्यानें यराबामाच्या सर्व घराण्याचा संहार केला; त्यानें यराबामाच्या कुळांतील सर्वांचा साफ नाश केला; त्यांतील एकहि प्राणी जीवंत ठेविला नाहीं; परमेश्वरानें आपला सेवक शिलोकर अहीया याच्याद्वारें जें वचन सांगितलें होतें त्याप्रमाणें हें सर्व झालें. ३० याचें कारण हेंच कीं यराबामानें स्वतः पापकर्में करून इस्राएलासहि तीं करावयास लाविलें आणि त्यानें इस्राएलाचा देव परमेश्वर यास संताप आणिला. ३१ नादाबानें केलेल्या बाकीच्या सर्व गोष्टी, त्यानें जें कांहीं केलें तें, या सर्वांचें वर्णन इस्राएलाच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय? ३२ आसा व इस्राएलाचा राजा बाशा यांची त्यांच्या साऱ्या हयातींत लढाई चालली होती.

३३ यहूदाचा राजा आसा याच्या कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षी अहीयाचा पुत्र बाशा तिरसा येथें सर्व

इस्राएलावर राज्य करूं लागला; त्यानें चोवीस वर्षें
राज्य केलें. ३४ त्यानें परमेश्वराच्या दृष्टीनें वाईट तें
केलें; त्यानें यराबामाचें अनुकरण केलें व जें पातक
त्यानें इस्राएलाकडून करविलें त्या पातकाच्या मार्गानें
तो चालला. १ हनानीचा पुत्र येहू यास
१६ बाशाच्याविरुद्ध परमेश्वराचें वचन प्राप्त झालें;
तें असें: २ मीं तुला धुळींतून वर काढून
माझ्या इस्राएल लोकांचा अधिपति केलें आहे, तरी
तूं यराबामाच्या मार्गानें चालला आहेस, तूं माझ्या
इस्राएल लोकांकडून पाप करविलें आहे, व त्यांनीं
आपल्या पातकांनीं मला संतप्त केलें आहे. ३ तर
पाहा, बाशा व त्याचें घराणें यांचा मी अगदीं
नायनाट करीन; आणि नबाटाचा पुत्र यराबाम याच्या
घराण्यासारखें तुझ्या घराण्याचें करीन. ४ बाशाचा जो
कोणी नगराच्या आंत मरेल त्याला कुत्रीं खाऊन
टाकितील; त्यांतला जो कोणी रानावनांत मरेल त्यास
आकाशांतील पक्षी खाऊन टाकितील. ५ बाशानें
केलेल्या बाकीच्या गोष्टी, त्यानें जें कांहीं केलें तें व
त्याचा पराक्रम या सर्वांचें वर्णन इस्राएलाच्या राजांच्या
बखरींत केलें आहे, नाहीं काय ? ६ बाशा आपल्या
पितरांजवळ जाऊन निजला व तिरसा येथें त्यास मूठ-
माती दिली; आणि त्याच्या जागीं त्याचा पुत्र एला
राजा झाला. ७ परमेश्वराचें वचन हनानीचा पुत्र येहू
संदेष्टा याच्या द्वारें बाशा व त्याचें घराणें यांच्याविरुद्ध
प्राप्त झालें; याचें कारण हें कीं बाशानें यराबामाच्या
घराण्याप्रमाणें परमेश्वराच्या दृष्टीनें वाईट तें करून
परमेश्वरास संताप आणिला व त्यानें नादाबास
ठार मारिलें.

८ यहूदाचा राजा आसा याच्या कारकीर्दीच्या
सव्विसाव्या वर्षी बाशाचा पुत्र एला हा तिरसा येथें
इस्राएलावर राज्य करूं लागला; त्यानें इस्राएलावर
दोन वर्षें राज्य केलें. ९ त्याचा चाकर जिम्री, जो
त्याच्या निम्म्या रथांवर अधिकारी होता, त्यानें
त्याजविरुद्ध फितुरी केली. एला तिरसा येथें असतां
तिरसांतल्या मंदिराचा त्याचा कारभारी अरसा याच्या
घरीं दारू पिऊन तो मस्त झाला; १० तेव्हां जिम्रीनें
आंत जाऊन त्यास ठार मारिलें; यहूदाचा राजा आसा
याच्या कारकीर्दीच्या सत्ताविसाव्या वर्षी हें झालें.
११ तो राज्य करूं लागला; आणि गादीवर बसतांच
त्यानें बाशाच्या सर्व घराण्याचा संहार केला, त्याच्या
आप्तमित्रांपैकीं एक मुलगा देखील त्यानें सोडिला नाहीं.
१२ या प्रकारें परमेश्वरानें जें वचन येहू संदेष्ट्याच्या
द्वारें बाशाच्या विरुद्ध सांगितलें होतें तदनुसार जिम्रीनें
त्याच्या सर्व घराण्याचा नाश केला; १३ बाशाचीं सर्व
पातकें व त्याचा पुत्र एला याचींहि सर्व पातकें जीं
त्यांनीं स्वतां केलीं व इस्राएलाकडून करवून त्यांना
व्यर्थ गोष्टींच्या नादीं लावून इस्राएलाचा देव परमेश्वर
यास संताप आणिला त्यामुळें असें झालें. १४ एलानें
केलेल्या बाकीच्या गोष्टींचें व त्यानें जें कांहीं केलें त्या
सर्वांचें वर्णन इस्राएलाच्या राजांच्या बखरींत केलें
आहे, नाहीं काय ?

१५ यहूदाचा राजा आसा याच्या कारकीर्दीच्या
सत्ताविसाव्या वर्षी जिम्री हा तिरसा येथें राज्य
करूं लागला; त्यानें तिरसांत सात दिवस राज्य
केलें. या समयीं लोक पलिष्ट्यांच्या ताब्यांतल्या
गिब्बथोन नगरापाशीं ठाणें देऊन राहिले होते.
१६ जिम्रीनें फितुरी करून राजास मारून टाकिलें आहे
असें त्या ठाणें देऊन राहिलेल्या लोकांनीं ऐकलें
त्याच दिवशीं सर्व इस्राएलांनीं अम्री नामें मुख्य सेना-
पतीस छावणींतच इस्राएलाचा राजा केलें. १७ अम्रीनें
सर्व इस्राएलास बरोबर घेऊन गिब्बथोन सोडून देऊन
तिरसास वेढा घातला. १८ नगर हस्तगत झालें असें
जिम्रीनें पाहिलें तेव्हां त्यानें राजवाड्याच्या बुरुजांत
जाऊन आपण आंत असतां राजवाड्यास आग लावून
दिली, आणि त्यांत तो स्वतःहि जळून मेला. १९ त्यानें
यराबामाचें अनुकरण केलें, व जें पाप त्यानें इस्राएला-
कडून करविलें त्याच पापाच्या मार्गानें तो चालला; अशीं
पातकें करून परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें
केलें म्हणून असें झालें. २० जिम्रीनें केलेल्या
बाकीच्या गोष्टी, त्यानें केलेली फितुरी या सर्वांचें

वर्णन इस्राएलाच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय ?

२१ त्या समयीं इस्राएल लोकांचे दोन भाग झाले; अर्धे लोक गीनथाचा पुत्र तिब्नी यास राजा करावें म्हणून त्याच्या पक्षाचे झाले, व अर्धे लोक अम्रीच्या पक्षाचे झाले. २२ अम्रीच्या पक्षाच्या लोकांनीं गीनथ-पुत्र तिब्नी याच्या पक्षाचा पराभव केला: तिब्नी प्राणास मुकला आणि अम्रीला राजपद मिळालें. २३ यहूदाचा राजा आसा याच्या कारकीर्दीच्या एकतिसाव्या वर्षी अम्री इस्राएलावर राज्य करूं लागला; त्यानें बारा वर्षें राज्य केलें; पहिलीं सहा वर्षें त्यानें तिरसा येथें राज्य केलें. २४ त्यानें शेमर याजकडून शोमरोन डोंगर दोन किक्कार रुपें देऊन घेतला; त्या डोंगरावर त्यानें एक नगर वसविलें आणि या वसविलेल्या नगरास त्या डोंगराचा मूळचा मालक शेमर याच्या नांवावरून शोमरोन असें नांव दिलें. २५ परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें अम्रीनें केलें; त्याच्यापूर्वी जे होऊन गेले त्या सर्वांहून अधिक दुराचार त्यानें केला. २६ नबाटाचा पुत्र यराबाम याच्या सर्व मार्गांचें त्यानें अवलंबन केलें आणि जीं पातकें यराबामानें स्वतः करून इस्राएला-कडून करविलीं व त्यास व्यर्थ गोष्टींच्या नादीं लावून इस्राएलाचा देव परमेश्वर यास संताप आणिला तीं सर्व पातकें त्यानें केलीं; २७ अम्रीनें केलेल्या बाकीच्या गोष्टी व त्यानें दाखविलेला पराक्रम या सर्वांचें वर्णन इस्राएलाच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय ? २८ अम्री आपल्या पितरांजवळ जाऊन निजला, आणि त्यास शोमरोन येथें मूठमाती दिली, आणि त्याच्या जागीं त्याचा पुत्र अहाब राजा झाला.

२९ यहूदाचा राजा आसा याच्या कारकीर्दीच्या अडतिसाव्या वर्षी अम्रीचा पुत्र अहाब इस्राएलावर राज्य करूं लागला; त्यानें इस्राएलावर शोमरोन येथें बावीस वर्षें राज्य केलें. ३० अम्रीचा पुत्र अहाब यानें परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें केलें; आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या सर्वांपेक्षां अधिक वाईट वर्तन त्यानें केलें. ३१ नबाटाचा पुत्र यराबाम याच्या पापकर्मांचें अनुकरण करणें ही क्षुल्लक गोष्ट आहे असें त्याला वाटलें. त्यानें सीदोन्यांचा राजा एथबाल याची कन्या ईजबेल हिजशीं लग्न केलें, आणि तो बालमूर्तींची सेवा व पूजा करूं लागला. ३२ त्यानें बालाचें एक भवन शोमरोन येथें बांधिलें व त्यांत बालाप्रीत्यर्थ एक वेदी बांधिली. ३३ अहाबानें अशेरा मूर्तीची स्थापना केली. त्यानें इस्राएलाचा देव परमेश्वर याला संताप आणण्या-जोगीं कामें आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या इस्राएलाच्या सर्व राजांहून अधिक केलीं. ३४ त्याच्या कारकीर्दीत बेथेलकर हिएल यानें यरीहो नगर पुनः वसविलें. त्यानें त्याचा पाया घातला तेव्हां त्याचा ज्येष्ठ पुत्र अबीराम मरण पावला; आणि त्यानें त्याच्या वेशी उभारिल्या तेव्हां त्याचा कनिष्ठ पुत्र सगूब मरण पावला; परमे-श्वरानें नूनाचा पुत्र यहोशवा याच्याद्वारें सांगितलें होतें त्याप्रमाणें हें झालें.

१७ १ एलीया तिश्बी हा गिलाद येथें उपरी म्हणून राहणाऱ्यांपैकीं एक होता; तो अहाबास म्हणाला, इस्राएलाचा देव परमेश्वर ज्याच्या हुजुरास मी असतों त्याच्या जीविताची मी शपथ वाहून सांगतों कीं जीं वर्षें आतां येणार त्यांत दहिंवर अथवा पर्जन्य पडणार नाहीं; हें सर्व माझ्या सांगण्याप्रमाणें होणार. २ परमेश्वराचें वचन त्यास प्राप्त झालें कीं ३ येथून निघून पूर्व दिशेस जा, व यार्देनेसमोरच्या करीथ ओहळाजवळ लपून राहा. ४ त्या ओहळाचें पाणी तुला प्यावयास मिळेल आणि मीं कावळ्यांस आज्ञा केली आहे, ते तुला अन्न पुरवितील. ५ परमेश्वराच्या सांगण्याप्रमाणें करून तो यार्देनेसमोरच्या करीथ ओहळाजवळ जाऊन राहिला. ६ कावळे त्यास भाकरी व मांस सकाळसंध्याकाळ आणून देत, व त्या ओहळाचें पाणी तो पिई. ७ कांहीं दिवसांनीं ओहळ आटून गेला, कारण त्या देशांत पर्जन्यवृष्टि झाली नाहीं.

८ तेव्हां त्यास परमेश्वराचें वचन प्राप्त झालें कीं ९ चल, सीदोन्यांतील सारफथ नगरांत जाऊन राहा;

१ निर्गम २५:३९ वरील टीप पाहा.

पाहा, तुझें पोषण करण्याची तेथल्या एका विधवेस मीं
आज्ञा केली आहे. १० त्याप्रमाणें तो सारफथ येथें गेला;
नगराच्या वेशीजवळ तो आला तेव्हां एका विधवा स्त्रीला
काटक्या गोळा करितांना त्यानें पाहिलें; तिला हाक
मारून तो म्हणाला, मला एका पात्रांत प्यावयास थोडेंसें
पाणी घेऊन ये. ११ ती पाणी आणावयास जात
असतां त्यानें तिला आणखी हाक मारून सांगितलें,
आपल्या हातीं एक भाकरीचा तुकडा मला घेऊन ये.
१२ ती म्हणाली, तुमचा देव परमेश्वर याच्या जीविताची
शपथ, माझ्याजवळ भाकर मुळींच नाहीं; मडक्यांत
मूठभर पीठ आणि कुपींत थोडेंसें तेल एवढें मात्र
आहे. मी दोन काटक्या जमा करीत आहें; मग मी
घरीं जाऊन मजसाठीं व आपल्या मुलासाठीं तें तयार करीन;
तें आम्ही खाऊं आणि मग मरूं. १३ एलीया
तिला म्हणाला, भिऊं नको, तूं जा आणि म्हणतेस
त्याप्रमाणें कर, पण त्यापूर्वी माझ्यासाठीं एक लहानशी
भाकर भाजून आण, नंतर आपल्यासाठीं व आपल्या
मुलासाठीं भाज. १४ इस्राएलाचा देव परमेश्वर म्हणतो,
परमेश्वर पृथ्वीवर पर्जन्यवृष्टि करील त्या दिवसापर्यंत
तुझें पिठाचें मडकें रिकामें होणार नाहीं आणि तेलाची
कुपी आटणार नाहीं. १५ तिनें जाऊन एलीयाच्या
सांगण्याप्रमाणें केलें; तो, ती व तिचें कुटुंब यांचा त्यावर
पुष्कळ दिवस निर्वाह झाला. १६ परमेश्वर एलीयाच्या
द्वारें जें वचन बोलला त्याप्रमाणें तिचें तें पिठाचें
मडकें रिकामें झालें नाहीं आणि तेलाची कुपीहि
आटली नाहीं. १७ यानंतर घरधनिणीचा मुलगा
आजारी पडला; त्याचा रोग इतका वाढला कीं त्याचा
श्वास बंद झाला. १८ तेव्हां ती एलीयास म्हणाली,
अहो देवाचे माणूस, आपला माझा काय संबंध? माझ्या
पातकाचें मला स्मरण द्यावें व माझ्या मुलास मारून
टाकावें म्हणून आपण माझ्या घरीं आलां आहां का? १९ तो
तिला म्हणाला, तुझ्या मुलास घेऊन ये. त्यानें त्यास
तिच्या कवेंतून घेऊन आपण राहत होता त्या माडीवर
नेलें आणि आपल्या बिछान्यावर निजविलें. २० मग
त्यानें परमेश्वराचा धावा करून म्हटलें, हे परमेश्वरा,
माझ्या देवा, मी ज्या विधवेच्या घरीं राहत आहें
तिचा पुत्र मारून तूं तिजवर अरिष्ट आणिलें काय?
२१ मग त्यानें तीन वेळां त्या मुलावर पाखर घातली
आणि परमेश्वराचा धावा करून म्हटलें, परमेश्वरा, हे
माझ्या देवा, या बालकाचा प्राण याच्या ठायीं पूर्ववत्
येऊं दे. २२ परमेश्वरानें एलीयाचा शब्द ऐकला
आणि त्या बालकाचा प्राण त्याच्या ठायीं पूर्ववत् येऊन
तो पुनरपि जीवंत झाला. २३ एलीया तें बालक
घेऊन माडीवरून खालीं आला आणि त्यास त्याच्या
आईच्या हवालीं करून म्हणाला, पाहा, तुझा मुलगा
जीवंत आहे. २४ ती स्त्री एलीयास म्हणाली, आपण देवाचे
माणूस आहां आणि परमेश्वराचें सत्य वचन आपल्या
तोंडून निघतें हें मला आतां कळून आलें.

१ बहुत दिवस लोटल्यावर, तिसरें वर्ष लागलें,
**१८** तेव्हां एलीयास परमेश्वराचें वचन प्राप्त झालें
कीं जा, अहाबाच्या दृष्टीस पड; मी पृथ्वीवर
पर्जन्यवृष्टि करणार आहें. २ त्याप्रमाणें अहाबाच्या
दृष्टीस पडावें म्हणून एलीया निघाला. त्या समयीं
शोमरोनांत भयंकर दुष्काळ होता. ३ अहाबानें आपला
घरकारभारी ओबद्या यास बोलावणें पाठविलें; हा
ओबद्या परमेश्वराला फार भिऊन वागत असे. ४ ईज-
बेल परमेश्वराच्या संदेष्ट्यांचा वध करीत होती
तेव्हां ओबद्यानें शंभर संदेष्टे नेऊन एका गुहेंत
पन्नास व दुसऱ्या गुहेंत पन्नास असे लपविले व
त्यांस अन्नपाणी पुरविलें. ५ अहाब ओबद्यास म्हणाला,
देशांत फिरून पाण्याचे झरे, नाले असतील ते सर्व
शोधून पाहा; घोडे व खेचरें यांचा जीव वांचविण्या-
पुरतें गवत कोठें तरी कदाचित् मिळेल व अशानें
आमचीं सगळीं जनावरें मरावयाचीं नाहींत.
६ सगळा देश धुंडाळावा म्हणून त्यांनीं तो आपसांत
वांटून घेतला; एका मार्गानें अहाब गेला व दुसऱ्या
मार्गानें ओबद्या गेला. ७ ओबद्या वाट चालत असतां
एलीया त्याला भेटला; त्यानें त्यास ओळखिलें आणि
दंडवत घालून त्यास म्हटलें, माझे स्वामी एलीया ते
आपणच काय? ८ तो म्हणाला, होय, तोच मी; जा,

आपल्या धन्यास सांग कीं एलीया आला आहे. ९ तो
म्हणाला, मला आपल्या दासाला मारून टाकण्यासाठीं
अहाबाच्या हातीं आपण देऊं पाहतां असा मीं काय
अपराध केला आहे? १० आपला देव परमेश्वर याच्या
जीविताची शपथ, माझ्या धन्यानें आपला शोध करण्या-
साठीं जेथें लोक पाठविले नाहींत असें एकहि राष्ट्र
किंवा राज्य उरलें नाहीं; तो अमुक ठिकाणीं नाहीं
असें त्यांनीं येऊन सांगितलें म्हणजे एलीया त्यांस
आढळला नाहीं अशी शपथ तो त्या त्या राज्यास व
राष्ट्रास घ्यावयास लावी; ११ आणि आतां आपण मला सांग-
तां कीं एलीया आला आहे असें तूं जाऊन आपल्या
धन्यास सांग. १२ मी आपणाकडून जातांच मला
कळणार नाहीं अशा ठिकाणीं परमेश्वराचा आत्मा आपणाला
घेऊन जावयाचा; आणि मीं जाऊन अहाबास हें वर्तमान
सांगितलें व आपण त्यास आढळला नाहीं तर तो मला
मारून टाकील. मी आपला दास तर बाळपणापासून परमे-
श्वराला भिऊन वागत आलों आहें; १३ ईजबेलीनें परमे-
श्वराच्या संदेष्ट्यांचा वध केला तेव्हां मीं परमेश्वराचे
शंभर संदेष्टे नेऊन एका गुहेंत पन्नास व दुसऱ्या गुहेंत
पन्नास असे लपवून ठेविले व त्यांस अन्नपाणी पुरविलें,
हें वर्तमान माझ्या स्वामीच्या कानीं आलें नाहीं काय?
१४ आतां आपण मला सांगतां कीं एलीया आला आहे
असें जाऊन आपल्या धन्यास सांग; पण तो माझा वध
करील. १५ एलीया म्हणाला, ज्या सेनाधीश परमेश्वराच्या
हुजुरास मी असतों, त्याच्या जीविताची शपथ.
आज मी खात्रीनें त्याच्या नजरेस पडणार. १६ तेव्हां
ओबद्यानें अहाबाची भेट घेऊन त्यास हें वर्तमान
सांगितलें; तेव्हां अहाब एलीयास भेटावयास गेला.
१७ एलीयाला पाहतांच अहाब म्हणाला, इस्राएलास
छळणारा तो तूंच ना? १८ तो म्हणाला, मीं इस्राएलास
छळिलें नाहीं; तर तूं व तुझ्या वडिलांच्या घराण्यानें
परमेश्वराच्या आज्ञा मानावयाचें सोडून बालमूर्तींच्या
नादीं लागून इस्राएलास छळिलें आहे. १९ आतां जासूद
पाठीव आणि सर्व इस्राएलास, बालमूर्तींच्या साडेचारशें
संदेष्ट्यांस आणि ईजबेलीच्या पंक्तीस जेवणाऱ्या अशेरा
मूर्तींच्या चारशें संदेष्ट्यांस कर्मेल डोंगरावर माझ्यापुढें
जमीव. २० तेव्हां अहाबानें सर्व इस्राएल लोकांस बोला-
वणें पाठविलें आणि संदेष्ट्यांस कर्मेल डोंगरावर जम-
विलें. २१ एलीया सर्व लोकांच्या सन्निध येऊन म्हणाला,
तुम्ही दोहों मतांमध्यें कोठवर लटपटाल? परमेश्वर हा
देव असला तर त्याच्या भजनीं लागा; बाल हा देव
असला तर त्याच्या भजनीं लागा. लोकांनीं त्यास एका
शब्दानेंहि उत्तर दिलें नाहीं. २२ एलीया लोकांस
म्हणाला, परमेश्वराच्या संदेष्ट्यांपैकीं मी एकटाच उरलों
आहें; बालाचे संदेष्टे तर साडेचारशें आहेत. २३ आम्हांस
दोन गोऱ्हे द्यावे; त्यांनीं आपल्यासाठीं वाटेल तो
गोऱ्हा घ्यावा; त्याचे त्यांनीं कापून तुकडे करावे
आणि ते इंधनांवर रचावे, पण त्यांस अग्नि लावूं नये;
मग मीहि दुसऱ्या गोऱ्ह्याचें तसेंच करून तो इंधनांवर
रचीन व त्याला अग्नि लावणार नाहीं. २४ तुम्ही
आपल्या देवाचें नाम घ्या आणि मी परमेश्वराचें
नाम घेतों; जो देव अग्नीच्या द्वारें उत्तर देईल
तोच देव ठरावा. सर्व लोक म्हणाले, ठीक आहे.
२५ एलीया बालाच्या संदेष्ट्यांस म्हणाला, प्रथम तुम्ही
वाटेल तो गोऱ्हा निवडून सिद्ध करा, कारण तुम्ही
पुष्कळ जण आहां; तुम्ही आपल्या देवाचें नाम घ्या,
पण अग्नि मात्र लावूं नका. २६ मग त्यांस दिलेला
गोऱ्हा त्यांनीं सिद्ध केला आणि सकाळपासून थेट
दोन प्रहरपर्यंत ते बालाचें नांव घेत व हे बाला,
आमचें ऐक, असें म्हणत राहिले; पण कांहीं वाणी
झाली नाहीं कीं कोणी उत्तर दिलें नाहीं. जी वेदी त्यांनीं
केली होती तिच्याभोवतीं ते नाचूंबागडूं लागले.
२७ दोन प्रहरीं एलीयानें त्यांची थट्टा करून म्हटलें,
मोठ्यानें पुकारा; देवच तो! तो विचारांत गढून गेला
असेल, तो एकांतांत गेला असेल, प्रवासांत असेल,
कदाचित् तो निजला असेल, त्याला जागें केलें पाहिजे.
२८ ते मोठमोठ्यानें हाका मारूं लागले आणि आपल्या
रिवाजाप्रमाणें सुऱ्यांनीं व भाल्यांनीं आपणांस घाव
करून घेऊं लागले, एवढें कीं ते रक्तबंबाळ झाले.
२९ दुपार टळून गेल्यावर संध्याकाळच्या यज्ञसमया-

पर्यंत ते बडबडत राहिले पण कांहीं वाणी झाली
नाहीं, कोणीं उत्तर दिलें नाहीं किंवा लक्ष पुरविलें
नाहीं. ३० मग एलीया सर्व लोकांस म्हणाला,
माझ्याजवळ या; तेव्हां सर्व लोक त्याच्याजवळ
आले. परमेश्वराची वेदी पाडून टाकिली होती ती
त्यानें दुरुस्त केली. ३१ तुझें इस्राएल असें नांव
पडेल, असें याकोबास परमेश्वराचें वचन प्राप्त झालें
होतें, त्याच्या वंशसंख्येइतके बारा धोंडे एलीयानें
घेतले. ३२ त्या धोंड्यांची त्यानें परमेश्वराच्या नामानें
वेदी बांधली; दोन मापें बीं राहील एवढी खळगी त्यानें
वेदीसभोवार खणिली. ३३ त्यानें वेदीवर इंधनें
ठेविलीं आणि गोऱ्हा कापून व तुकडे करून ते इंधनां-
वर रचिले. मग तो म्हणाला, चार घागरी पाणी
भरून होमबलीवर व इंधनांवर ओता. ३४ तो पुनः
म्हणाला, दुसऱ्यांदा तसेंच करा; तेव्हां लोकांनीं
दुसऱ्यांदा तसेंच केलें; तो म्हणाला, तिसऱ्यांदा
तसेंच करा; आणि त्यांनीं तिसऱ्यांदा तसेंच केलें.
३५ पाणी वेदीवरून सभोवार वाहिलें; आणि ती
खळगीहि पाण्यानें भरली. ३६ संध्याकाळच्या यज्ञ-
समयीं एलीया संदेष्टा पुढें होऊन म्हणाला, हे परमे-
श्वरा, अब्राहाम, इसहाक व इस्राएल यांच्या देवा,
इस्राएलामध्यें तूंच देव आहेस, मी तुझा सेवक आहें,
आणि मीं ह्या सर्व गोष्टी तुझ्याच आज्ञेनें केल्या आहेत
हें सर्वांस विदित कर. ३७ हे परमेश्वरा, ऐक, माझी
विनंति ऐक, हे परमेश्वरा, तूंच देव आहेस आणि
तूंच यांचीं हृदयें पराङ्मुख केलीं आहेस, याची या
लोकांस जाणीव होऊं दे. ३८ तेव्हां परमेश्वरापासून
अग्नि उतरला आणि त्यानें होमबलि, इंधनें, धोंडे आणि
माती हीं भस्म करून टाकिलीं आणि त्या खळगींतलें
पाणी चाटिलें. ३९ हें पाहून सर्व लोक पालथे पडून
म्हणाले, परमेश्वर हाच देव! परमेश्वर हाच देव!
४० एलीया त्यांस म्हणाला, बालाच्या संदेष्ट्यांस पकडा;
त्यांतल्या एकासहि निसटून जाऊं देऊं नका. तेव्हां त्यांनीं
त्यांस पकडिलें; एलीयानें त्यांस खालीं किशोन ओहळा-
नजीक आणून वधिलें. ४१ एलीया अहाबास म्हणाला,
ऊठ, खा, पी; विपुल पर्जन्यवृष्टीचा ध्वनि होत आहे.
४२ मग अहाब खावयाप्यावयास वरतीं गेला. इकडे
एलीया कर्मेलाच्या माथ्यावर गेला आणि त्यानें जमिनी-
पर्यंत लवून आपलें तोंड आपल्या गुडघ्यांमध्यें घातलें.
४३ त्यानें आपल्या चाकरास सांगितलें, वर चढ;
समुद्राकडे दृष्टि लाव. त्यानें जाऊन टेहळिलें आणि
म्हटलें, कांहीं दिसत नाहीं; एलीया म्हणाला, आणखी
सातदां जा. ४४ सातव्या खेपेस तो म्हणाला, पाहा,
समुद्रांतून मनुष्याच्या हाताएवढा एक लहानसा ढग वर
येत आहे. एलीया म्हणाला, अहाबाकडे जाऊन सांग,
रथ जुंपून खालीं जा, नाहीं तर पाऊस तुला जाऊं
देणार नाहीं. ४५ थोड्याच वेळानें मेघ व तुफान
यांहींकरून आकाश काळेंभोर झालें आणि मोठा
पाऊस पडला. अहाब रथांत बसून इज्रेलास चालला
होता. ४६ परमेश्वराचा वरदहस्त एलीयावर असल्यामुळें
तो आपली कमर बांधून अहाबापुढें इज्रेलाच्या
वेशीपर्यंत धांवत गेला.

१९ १ एलीयानें काय काय केलें, तसेंच त्यानें सर्व
संदेष्टे तरवारीनें कसे वधिले हें सगळें अहा-
बानें ईजबेलीस कळविलें. २ तेव्हां ईजबेलीनें
जासूद पाठवून एलीयास बजाविलें कीं त्या संदेष्ट्यांच्या
जिवाच्या गतीसारखी तुझ्या जिवाची गति उद्यां
याच वेळीं केली नाहीं तर देव माझें तसेंच, व त्याहूनहि
अधिक करोत. ३ हें पाहून एलीया जीव घेऊन
पळाला; तो यहूदांतील बैर-शेबा येथें आला व तेथें
त्यानें आपल्या चाकरास ठेविलें. ४ तो स्वतः रानांत
एक दिवसाची मजल चालून जाऊन एका रतामाच्या
झुडपाखालीं जाऊन बसला; आपला प्राण जाईल तर
बरें असें वाटून तो म्हणाला, हे परमेश्वरा, आतां पुरें
झालें, माझा अंत कर; मी आपल्या वाडवडिलांहून
कांहीं चांगला नाहीं. ५ मग तो रतामाच्या झुडपा-
खालीं पडून झोपीं गेला; तेव्हां एका देवदूतानें त्यास
स्पर्श करून म्हटलें, ऊठ, हें खा. ६ त्यानें पाहिलें तों
निखाऱ्यांवर भाजलेली एक भाकर व पाण्याची एक
सुरई आपल्या उशाशीं ठेविली आहे असें त्याच्या

दृष्टीस पडलें. तो खाऊनपिऊन पुनः झोपीं गेला.
७ परमेश्वराचा देवदूत पुनः दुसऱ्यांदा त्याजकडे
आला व त्याला स्पर्श करून म्हणाला, ऊठ, हें खा;
कारण तुला भारी वाटेल असा प्रवास करावयाचा
आहे. ८ त्यानें उठून तें अन्नपाणी सेवन केलें; त्या
अन्नाच्या बळावर चाळीस दिवस व चाळीस रात्री
चालत जाऊन तो देवाचा डोंगर होरेब येथें पोहंचला.
९ तो तेथें जाऊन एका गुहेंत राहिला; तेव्हां, पाहा,
परमेश्वराचें वचन त्यास प्राप्त झालें. तो त्यास म्हणाला,
एलीया, तूं येथें कशासाठीं आलास? १० तो म्हणाला,
सेनाधीश देव परमेश्वर याजविषयीं मी फार ईर्ष्यायुक्त
झालों आहें; कारण इस्राएल लोकांनीं तुझा करार पाळ-
ण्याचें सोडिलें, तुझ्या वेद्या मोडून टाकिल्या, तुझे संदेष्टे
तरवारीनें वधिले; मीच कायतो एकटा उरलों आहें; आणि
आतां ते माझाहि जीव घेऊं पाहत आहेत. ११ त्यानें
त्यास म्हटलें, तूं येथून बाहेर निघून जा; पर्वतावर
परमेश्वरासमोर उभा राहा. तेव्हां पाहा, परमेश्वर जवळून
जात असतां त्याजसमोरून मोठा सुसाट्याचा वारा सुटून
डोंगर विदारीत व खडक फोडीत होता; पण त्या वाऱ्यांत
परमेश्वर नव्हता. वारा सुटल्यानंतर भूमिकंप झाला; पण
त्या भूमिकंपांतहि परमेश्वर नव्हता. १२ भूमिकंपानंतर
अग्नि प्रगट झाला; पण त्या अग्नींतही परमेश्वर
नव्हता; त्या अग्नीनंतर शांत, मंद वाणी झाली.
१३ एलीयानें ती ऐकतांच आपल्या झग्यानें तोंड
झाकून घेतलें व बाहेर जाऊन गुहेच्या तोंडाशीं तो
उभा राहिला. तेव्हां त्यास वाणी ऐकूं आली, ती
अशी: एलीया, तूं येथें कशासाठीं आलास? १४ तो
म्हणाला, सेनाधीश देव परमेश्वर याजविषयीं मी फार
ईर्ष्यायुक्त झालों आहें, कारण इस्राएल लोकांनीं तुझा
करार पाळण्याचें सोडिलें, तुझ्या वेद्या मोडून टाकिल्या,
तुझे संदेष्टे तरवारीनें वधिले; मीच कायतो एकटा
उरलों आहें; आणि आतां ते माझाहि जीव
घेऊं पाहत आहेत. १५ परमेश्वर त्यास म्हणाला, तूं
परत दिमिष्काच्या रानाकडे जा; तेथें जाऊन पोहंच-
ल्यास म्हणजे हजाएलास अभिषेक करून अरामावर
राजा नेम. १६ निम्शीचा पुत्र येहू यास अभिषेक
करून इस्राएलावर राजा नेम; तसेंच आबेल-महोला
येथील शाफाटाचा पुत्र अलीशा यास अभिषेक करून
तुझ्या जागीं संदेष्टा नेम. १७ हजाएलाच्या तरवारी-
पासून जो सुटेल त्यास येहू मारील; आणि येहूच्या तर-
वारीपासून जो सुटेल त्यास अलीशा मारील; १८ तरी
पण पाहा, इस्राएलांपैकीं सात हजारांनीं बालमूर्तीपुढें गुडघे
टेकिले नाहींत व त्यांतल्या एकानेंहि आपल्या मुखानें
त्याचें चुंबन घेतलें नाहीं; त्यांस मी वांचवीन. १९ तो
तेथून निघाला तेव्हां त्यास शाफाटाचा पुत्र अलीशा
भेटला; तो बैलांचीं बारा जोतें चालवून शेत नांगरीत
असे, आणि तो स्वतः बाराव्या जोताबरोबर होता. त्याच्या
जवळ जाऊन एलीयानें आपला झगा त्याजवर टाकिला.
२० तेव्हां तो बैल सोडून एलीयाच्या मागून धावला;
तो त्यास म्हणाला, मला आपल्या आईबापांचें चुंबन
घेऊन येऊं द्या; मग मी आपला अनुयायी होईन. तो त्यास
म्हणाला, परत जा, मीं तुझें काय केलें? २१ मग तो
त्याच्या मागून जाण्याचें सोडून परतला आणि बैलांची
एक जोडी घेऊन त्यानें कापली आणि बैलांचीं आउतें
पेटवून त्यांवर त्यांचें मांस भाजिलें; तें त्यानें आपल्या
लोकांस दिलें, तें त्यांनीं खाल्लें. मग तो उठून
एलीयाबरोबर गेला व त्याची सेवा करूं लागला.

२० १ अरामाचा राजा बेन-हदाद यानें आपली
सारी सेना एकवट केली; त्याच्याबरोबर बत्तीस
राजे, घोडे व रथ होते; त्यांसह तो गेला;
आणि शोमरोनास वेढा घालून त्याशीं लढला. २ त्यानें
इस्राएलाचा राजा अहाब याला नगरांत जासुदाच्या
द्वारें येणेंप्रमाणें सांगून पाठविलें: बेन-हदाद म्हणतो
कीं ३ तुझें सोनें व चांदी हीं माझीं आहेत, तुझ्या
स्त्रिया व मुलें यांपैकीं जीं उत्तम असतील तीं सर्व
माझीं आहेत. ४ इस्राएलाच्या राजानें उत्तर* पाठविलें,
माझे स्वामीराज, आपल्या म्हणण्याप्रमाणें मी
आपला व माझें सर्वस्वहि आपलेंच आहे. ५ जासुदानें पुनः
येऊन त्यास सांगितलें, बेन-हदाद असें म्हणतो, आपलें
सोनें, रुपें, स्त्रिया व मुलें तुला माझ्या स्वाधीन

करावीं लागतील असें मीं तुला सांगून पाठविलें होतें;
६ पण उद्यां याच वेळीं मी आपले चाकर तुजकडे
पाठविणार आहें, ते तुझें व घर तुझ्या चाकरांचीं घरें
धुंडाळितील; तुझ्या दृष्टीनें जें जें कांहीं तुला प्रिय
असेल तें तें हस्तगत करून नेतील. ७ तेव्हां इस्रा-
एलाचा राजा देशांतील सर्व वडील जनांस बोलावून
आणून म्हणाला, पाहा, हा मनुष्य माझें कसें अनिष्ट
करूं पाहत आहे; माझ्या स्त्रिया, मुलें, सोनें व रुपें
हस्तगत करण्यास त्यानें मजकडे मनुष्य पाठविला
तेव्हां मीं नाहीं म्हटलें नाहीं. ८ सर्व वडील मंडळी व
इतर लोक यांनीं त्यास सांगितलें, आपण त्यांचें म्हणणें ऐकूं
नका, त्यास कबूल होऊं नका. ९ यावरून राजानें बेन-
हदादाच्या जासुदांस म्हटलें, माझ्या स्वामीराजांस
सांगा, आपण पहिल्यानें जें कांहीं सांगून पाठविलें तें
सगळें करण्यास मी कबूल आहें, पण हें माझ्यानें
व्हावयाचें नाहीं. ते जासूद माघारीं गेले आणि
पुनरपि निरोप घेऊन आले. १० बेन-हदादानें परत
असा निरोप पाठविला कीं शोमरोनाची धूळ माझ्या-
बरोबरच्या लोकांस एकएक पसा पुरली तर देव
माझें तसेंच, किंबहुना त्याहूनहि अधिक करोत.
११ इस्राएलाच्या राजानें त्यास उत्तर पाठविलें,
युद्धासाठीं कंबर बांधणाऱ्यानें युद्ध करून कंबर सोडणाऱ्या-
प्रमाणें फुशारकी मारूं नये. १२ हा निरोप बेन-
हदादास मिळाला त्या समयीं तो व इतर राजे डेऱ्यांमध्यें
सुरापान करीत होते; तो आपल्या सैनिकांस म्हणाला :
व्यूह रचा. तेव्हां त्यांनीं नगरापुढें व्यूह रचिला.
१३ तेव्हां इस्राएलाचा राजा अहाब याजकडे एक
संदेष्टा येऊन म्हणाला, परमेश्वर म्हणतो, हा सगळा
मोठा समुदाय तुला दिसतो आहे ना! पाहा, तो सर्व
आज मी तुझ्या हातीं देईन; मी परमेश्वर आहें याची
तुला जाणीव होईल. १४ अहाबानें विचारिलें, कोणाच्या
हस्तें? तो म्हणाला, परमेश्वर म्हणतो, प्रांताधिकाऱ्यांच्या
पदरीं असलेल्या माणसांच्या हस्तें. त्यानें विचारिलें, लढाईस
आरंभ कोण करणार? तो म्हणाला, तूंच. १५ मग
त्यानें प्रांताधिकाऱ्यांच्या पदरीं असलेल्या माणसांची मोज-
दाद केली, ते दोनशें बत्तीस भरले; त्यांच्यानंतर
एकंदर इस्राएल लोकांची मोजदाद केली, ते सात
हजार भरले. १६ ते भर दोन प्रहरीं चाल करून गेले.
त्या प्रसंगीं बेन-हदाद व त्याच्या कुमकेस आलेले बत्तीस
राजे डेऱ्यांमध्यें सुरा पिऊन धुंद झाले होते.
१७ प्रांताधिकाऱ्यांच्या पदरचीं माणसें प्रथम बाहेर
पडलीं; बेन-हदादानें हेर पाठविले व त्यांनीं परत येऊन
खबर दिली कीं शोमरोनांतून कांहीं माणसें बाहेर पडलीं
आहेत. १८ त्यानें सांगितलें कीं तीं सल्ला करण्यास
येत असलीं तरी त्यांस जीवंत पकडा आणि लढाई
करण्यास येत असलीं तरी त्यांस जीवंत पकडा.
१९ प्रांताधिकाऱ्यांच्या पदरचे ते लोक नगरांतून बाहेर
पडले; व त्यांच्या पाठोपाठ सेना बाहेर पडली. २० एका-
एका माणसानें एकाएका माणसाचा समाचार घेतला;
तेव्हां अरामी लोक पळत सुटले आणि इस्राएल
लोक त्यांच्या पाठीस लागले; अरामाचा राजा
बेन-हदाद हा आपल्या घोड्यावर स्वार होऊन कांहीं
घोडेस्वारांनिशीं निसटला. २१ इस्राएलाच्या राजानें
बाहेर पडून घोडे व रथ यांवर मारा करून अराम्यांची
मोठी कत्तल उडविली. २२ मग तो संदेष्टा इस्राएलाच्या
राजाकडे येऊन म्हणाला, तूं आपली मजबुती कर,
सावध राहा, जपून वाग; नवें वर्ष लागतांच अरामाचा
राजा पुनः तुझ्यावर स्वारी करील.

२३ अरामाच्या राजाचे सेवक त्यास म्हणाले,
त्यांचा देव पहाडी देव आहे; म्हणूनच आम्हांवर त्यांचें
प्राबल्य झालें; तर आतां सपाटीवर आपण त्यांच्याशीं युद्ध
करूं म्हणजे आमचें त्यांच्यावर प्राबल्य खात्रीनें होईल.
२४ आतां एवढें मात्र करा, राजांस काढून टाका,
प्रत्येकाला त्याच्या जागेवरून दूर करा; आणि त्यांच्या
जागीं सुभेदार नेमा; २५ आणि आपलें जें सैन्य जायां झालें
तेवढ्याची घोड्यास घोडा, रथास रथ अशी भरती
करा; मग आपण सपाटीवर त्यांच्याशीं युद्ध करूं व
आपलें प्राबल्य त्यांच्यावर खात्रीनें होईल. त्यांची ही
मसलत मान्य करून बेन-हदादानें तसें केलें.
२६ नवीन वर्ष लागतांच बेन-हदाद अरामी लोक एक-

वट करून इस्राएलाशीं लढण्यास अफेक येथें गेला.
२७ इकडे इस्राएल लोकहि एकवट होऊन व अन्न-
सामग्रीचा पुरवठा करून त्यांच्याशीं सामना करण्यास
गेले; इस्राएल लोकांनीं त्यांच्यासमोर तळ दिला; ते
बकऱ्यांच्या दोन कळपांसारखे भासले, पण अरामी
लोकांनीं देश व्यापून टाकिला. २८ तेव्हां देवाच्या
माणसानें इस्राएलाच्या राजाकडे जाऊन सांगितलें,
परमेश्वर असें म्हणतो, परमेश्वर हा पहाडी देव आहे,
तळवटीचा देव नाहीं असें अरामी लोक म्हणाले आहेत,
यास्तव हा सर्व मोठा समुदाय मी तुझ्या हातीं देतों;
मग मी परमेश्वर आहें अशी तुम्हांस जाणीव होईल.
२९ सात दिवस ते एकमेकांसमोर तळ देऊन राहिले;
सातव्या दिवशीं लढाई सुरू झाली; तेव्हां इस्राएल
लोकांनीं एका दिवसांत एक लक्ष अरामी पायदळाचा
संहार केला. ३० उरलेले लोक अफेक शहराकडे पळून
जाऊन त्यांत शिरले; तेव्हां शहराचा तट कोसळून
त्यांतल्या सत्तावीस हजार लोकांवर पडला. बेन-
हदादहि पळून गेला व नगरांतल्या एका घरांतल्या
आंतल्या खोलींत लपून राहिला. ३१ त्याचे सेवक
त्यास म्हणाले, पाहा, आम्ही असें ऐकतों कीं इस्राएल
घराण्याचे राजे दयाळू असतात; तर कमरेस गोणताट
गुंडाळून व गळ्यांत दोऱ्या बांधून आम्हांस इस्राएलाच्या
राजाकडे जाऊं द्या; तो कदाचित् आपला प्राण वांचवील.
३२ त्याप्रमाणें ते कमरेस गोणताट गुंडाळून व गळ्यांत
दोऱ्या बांधून इस्राएलाच्या राजाकडे जाऊन म्हणाले,
आपला दास बेन-हदाद म्हणतो, मला जीवदान द्यावें.
राजा म्हणाला, तो अजून जीवंत आहे काय ? तो तर
माझा बंधु आहे. ३३ हा शुभशकुन समजून त्यांनीं
त्याच्या मनांत काय आहे तें समजण्यासाठीं त्याचे शब्द
चटकन झेलून म्हटलें, आपला बंधु बेन-हदाद ! राजा
त्यांस म्हणाला, जा, त्यास घेऊन या. बेन-हदाद
त्याच्यापाशीं आल्यावर त्यानें त्यास आपल्या रथांत
घेतलें. ३४ बेन-हदाद त्यास म्हणाला, जीं नगरें माझ्या
बापानें आपल्या बापापासून घेतलीं तीं मी परत देतों;
माझ्या बापानें शोमरोनांत पेठा वसविल्या तशाच आपणहि
दिमिष्कांत आपल्या नांवाच्या पेठा वसवा; अहाब
म्हणाला, या शर्तीवर तुला सोडून देतों, त्यानें
बेन-हदादाशीं करारमदार करून त्यास सोडून दिलें.

३५ त्यानंतर संदेष्ट्यांच्या शिष्यांपैकीं एक जण परमे-
श्वराच्या स्फूर्तीनें आपल्या सोबत्यास म्हणाला, मला
मार, तो मनुष्य त्यास मारावयास कबूल होईना.
३६ मग तो त्यास म्हणाला, तूं परमेश्वराचें वचन
मानिलें नाहींस तर, पाहा, मजकडून तूं जातांच
सिंह तुला मारून टाकील. तो त्याच्याकडून जातांच
त्यास एका सिंहानें गांठून फाडून टाकिलें. ३७ त्या
शिष्यास दुसरा मनुष्य भेटला; त्यास तो म्हणाला, मला
मार. त्या मनुष्यानें त्यास मारून घायाळ केलें.
३८ मग तो संदेष्टा चालता झाला, आणि आपले डोळे
पागोट्याच्या पदरानें झाकून राजाची मार्गप्रतीक्षा
करीत रस्त्यांत उभा राहिला. ३९ राजा जवळून जात
असतां त्यानें त्यास हाक मारून म्हटलें, आपला सेवक
रणभूमीवर गेला होता तेव्हां एक मनुष्य दुसऱ्या एका
मनुष्यास घेऊन मजकडे आला आणि म्हणाला, या
मनुष्यास संभाळ; जर का हा नाहींसा झाला तर तुझा
जीव त्याच्या जिवाचा मोबदला होईल, नाहीं तर तुला
शंभर रत्तल चांदीचा दंड होईल. ४० आपला सेवक इकडे
तिकडे कामांत गुंतला असतां तो निसटून गेला.
इस्राएलाच्या राजानें त्यास म्हटलें, तोच तुझा न्याय; तूं
आपल्याच तोंडानें निर्णय केला. ४१ त्या संदेष्ट्यानें
आपल्या डोळ्यांवरचा पागोट्याचा पदर चटकन काढिला;
तेव्हां हा कोणी संदेष्टा आहे असें इस्राएलाच्या राजानें
ओळखिलें. ४२ तो राजास म्हणाला, परमेश्वर असें
म्हणतो, ज्या मनुष्याचा नाश मीं योजिला होता तो
मनुष्य तूं आपल्या हातचा जाऊं दिला, तर त्याच्या
प्राणाबद्दल तुझा प्राण जाईल व त्याच्या लोकांबद्दल
तुझे लोक जातील. ४३ मग इस्राएलाचा राजा उदास
व खिन्न होऊन शोमरोनास आपल्या घरीं गेला.

२१

१ वरील गोष्टींनंतर असें झालें कीं इज्रेलकर
नाबोथ याचा द्राक्षीचा मळा इज्रेल येथें शोमरोनचा
राजा अहाब याच्या राजवाड्यापाशीं होता.

२ अहाब नाबोथास म्हणाला, तुझा द्राक्षीचा मळा माझ्या
वाड्यानजीक आहे, तो मला दे, म्हणजे मी त्यांत भाजी-
पाला लावीन; त्याच्याऐवजीं मी तुला त्याहून चांगला
द्राक्षीचा मळा देतों, किंवा तुझी इच्छा असल्यास मी तुला
त्याचे पैसे देतों. ३ नाबोथ अहाबास म्हणाला, माझ्या
वाडवडिलांचें वतन मीं आपणाला द्यावें असें परमेश्वर
माझ्या हातून न घडवो. ४ मी आपल्या वाडवडिलांचें
वतन तुला देणार नाहीं, असें इस्रेलकर नाबोथ म्हणाला,
म्हणून अहाब उदास व खिन्न होऊन आपल्या घरीं
गेला. तो जाऊन बिछान्यावर पडला आणि आपलें
तोंड फिरवून अन्न सेवन करीना. ५ तेव्हां त्याची स्त्री
ईजबेल ही त्याच्याकडे येऊन विचारूं लागली, आपण
अन्न सेवन करीत नाहीं, इतकें आपलें मन कां खिन्न
झालें आहे ? ६ तो तिला म्हणाला, इस्रेलकर नाबोथ
यास मी म्हणालों कीं पैसे घेऊन मला तुझा द्राक्षीचा
मळा दे, अथवा तुला पसंत वाटल्यास मी त्याच्याऐवजीं
तुला दुसरा द्राक्षीचा मळा देतों; यावर तो म्हणाला, मी
आपला द्राक्षीचा मळा तुला द्यावयाचा नाहीं. ७ त्याची
बायको ईजबेल त्यास म्हणाली, सांप्रत इस्राएलावर
आपली राजसत्ता आहे ना ! चला, उठा, अन्न सेवन करा,
आपलें मन आनंदित करा; इस्रेलकर नाबोथाचा द्राक्षीचा
मळा मी आपणाला मिळवून देतें. ८ मग तिनें अहाबाच्या
नांवानें पत्रें लिहिलीं व त्यांवर त्याची मुद्रा केली;
आणि नाबोथ राहत होता त्या गांवांत त्याच्या
शेजारीं राहणारे वडील जन व सरदार यांजकडे
तीं रवाना केलीं. ९ तिनें पत्रांत याप्रमाणें लिहिलें:
उपवासाचा जाहीरनामा काढा व नाबोथास लोकांसमोर
उच्चस्थानीं बसवा, १० आणि दोन अधम मनुष्यें
त्याच्यासमोर बसवा; त्यानें देवाचा व राजाचा धिक्कार
केला अशी साक्ष त्या दोघांनीं द्यावी; मग गांवाबाहेर
नेऊन त्याला मरेतों दगडमार करावा. ११ ईज-
बेलीच्या पत्रांतील आज्ञेप्रमाणें त्या गांवांत राहणाऱ्या
वडील जनांनीं व सरदारांनीं केलें. १२ त्यांनीं
उपवासाचा जाहीरनामा काढिला, आणि नाबोथास
लोकांसमोर उच्चस्थानीं बसविलें. १३ दोन अधम पुरुष
येऊन त्याच्यासमोर बसले; त्या अधम पुरुषांनीं
लोकांसमक्ष नाबोथाविरुद्ध साक्ष दिली; ते म्हणाले,
त्या नाबोथानें देवाचा व राजाचा धिक्कार केला आहे.
यानंतर त्यांनीं त्यास नगराबाहेर नेऊन तो मरेतों
दगडमार केला. १४ त्यांनीं ईजबेलीस सांगून पाठ-
विलें कीं नाबोथास दगडमार केला व तो मेला.
१५ नाबोथास दगडमार होऊन तो मेला हें ईज-
बेलीनें ऐकलें तेव्हां ती अहाबास म्हणाली, उठा, जो
द्राक्षीचा मळा इस्रेलकर नाबोथ पैसे घेऊन आपल्याला
देण्यास कबूल नव्हता तो ताब्यांत घ्या; नाबोथ आतां
जीवंत नाहीं, मेला आहे. १६ इस्रेलकर नाबोथ मरण
पावला हें अहाबानें ऐकलें तेव्हां तो त्याच्या
द्राक्षीच्या मळ्याचा ताबा घ्यावयास जाण्यासाठीं उठला.

१७ इकडे एलीया तिश्बी यास परमेश्वराचें वचन प्राप्त
झालें कीं १८ ऊठ, शोमरोननिवासी इस्राएलाचा राजा
अहाब याच्या भेटीस जा; तो नाबोथाच्या द्राक्षीच्या
मळ्यांत आहे; त्याचा ताबा घेण्यासाठीं तो तेथें गेला आहे.
१९ तूं त्यास सांग, परमेश्वर म्हणतो, तूं खून करून
मळ्याचा ताबा घेतला आहे काय ? तूं त्यास सांग, ज्या
ठिकाणीं कुत्र्यांनीं नाबोथाचें रक्त चाटून खाल्लें त्याच
ठिकाणीं कुत्रे तुझेंहि रक्त चाटून खातील. २० अहाब
एलीयास म्हणाला, माझ्या वैऱ्या, तूं मला गांठिलें
काय ? तो म्हणाला, होय, मीं तुला गांठिलें आहे,
कारण परमेश्वराच्या दृष्टीनें वाईट तें करावें म्हणून तूं
आपणास विकून टाकिलें आहे. २१ पाहा, मी तुजवर असें
अरिष्ट आणीन कीं तुझा अगदीं धुव्वा उडेल, आणि
अहाबाचा प्रत्येक मुलगा, मग तो इस्राएल लोकांच्या
अटकेंत असो कीं मोकळा असो, त्याचा मी उच्छेद करीन;
२२ तूं मला संताप आणिला आणि इस्राएल लोकांस
पाप करावयास लाविलें, यास्तव मी तुझ्या घराण्याचें
नबाटाचा पुत्र यराबाम व अहीयाचा पुत्र बाशा यांच्या
घराण्यांप्रमाणें करीन. २३ ईजबेलीविषयींहि परमेश्वर
असें म्हणतो, इस्रेलाच्या तटाजवळ ईजबेलीस कुत्रीं
खातील. २४ अहाबाचा जो कोणी नगरांत मरेल त्यास
कुत्रीं खातील व जो कोणी रानावनांत मरेल त्यास

आकाशांतले पक्षी खातील. २५ (अहाबासारखा दुसरा कोणी झाला नाहीं; त्याची बायको ईजबेल हिनें त्याला भर दिल्यामुळें त्यानें परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें करण्यास स्वतांला विकून टाकिलें होतें; २६ परमेश्वरानें इस्राएलापुढून देशांतून घालवून दिलेल्या अमोरी लोकांप्रमाणें त्यानें मूर्तींच्या नादीं लागून पुष्कळ अमंगळ कर्में केलीं.) २७ एलीयाचे हे शब्द ऐकून अहाबानें आपलीं वस्त्रें फाडिलीं व अंगास गोणताट गुंडाळून उपवास केला; तो गोणताटावर निजूं लागला व मंदगतीनें चालूं लागला. २८ यानंतर एलीया तिश्बी यास परमेश्वराचें असें वचन प्राप्त झालें कीं २९ अहाब माझ्यापुढें कसा दीन झाला आहे हें तूं पाहतोस ना? तो माझ्यापुढें दीन झाला आहे म्हणून मी हें अरिष्ट त्याच्या हयातींत आणणार नाहीं, तर त्याच्या पुत्राच्या हयातींत त्याच्या घराण्यावर हें अरिष्ट आणीन.

# २२

१ अरामी लोक व इस्राएल लोक यांच्यामध्यें तीन वर्षें लढाई झाली नाहीं. २ तिसऱ्या वर्षी यहूदाचा राजा यहोशाफाट इस्राएलाच्या राजाकडे आला. ३ तेव्हां इस्राएलाचा राजा आपल्या सेवकांस म्हणाला, रामोथ-गिलाद आपलेंच आहे हें तुम्हांस ठाऊक आहे काय? तर आपण स्वस्थ कां राहावें? तें अरामाच्या राजापासून हिसकावून कां घेऊं नये? ४ तो यहोशाफाटास म्हणाला, रामोथ-गिलाद येथें लढावयास आपण मजबरोबर याल काय? त्यास यहोशाफाटानें उत्तर दिलें, मी आणि आपण एकच; माझे लोक ते आपलेच व माझे घोडे ते आपलेच. ५ यहोशाफाटानें इस्राएलाच्या राजास म्हटलें, आज परमेश्वराचा आदेश विचारून घे. ६ इस्राएलाच्या राजानें सुमारें चारशें संदेष्टे जमवून त्यांस विचारिलें, मी रामोथ-गिलादावर चढाई करून जाऊं किंवा नको? त्यांनीं उत्तर दिलें, चढाई करून जा; प्रभु तें महाराजांच्या हातीं देईल. ७ तेव्हां यहोशाफाटानें विचारिलें, यांखेरीज दुसरा कोणी तरी परमेश्वराचा संदेष्टा नाहीं काय? त्याला आम्ही प्रश्न विचारूं. ८ इस्राएलाचा राजा यहोशाफाटास म्हणाला, ज्याच्या द्वारें परमेश्वराचा सल्ला घेतां येईल असा आणखी एक मनुष्य आहे, पण मला त्याचा तिरस्कार वाटतो; कारण मला अनुकूळ असा संदेश तो कधींहि देत नाहीं, प्रतिकूळ तेवढाच देतो; तो इम्लाचा पुत्र मीखाया होय. यहोशाफाट म्हणाला, महाराजांनीं असें बोलूं नये. ९ तेव्हां इस्राएलाच्या राजानें एका कारभाऱ्यास बोलावून सांगितलें, लवकर जाऊन इम्लाचा पुत्र मीखाया यास घेऊन ये. १० इस्राएलाचा राजा आणि यहूदाचा राजा यहोशाफाट हे आपआपलीं राजवस्त्रें धारण करून शोमरोनाच्या वेशीजवळ एका उघड्या जागेंत आपआपल्या सिंहासनावर विराजमान झाले होते, आणि सर्व संदेष्टे त्यांच्यापुढें भाषण करीत होते. ११ तेव्हां कनानाचा पुत्र सिदकीया यानें लोखंडाचीं शिंगें करून आणिलीं होतीं; तो म्हणाला, परमेश्वर म्हणतो, या शिंगांनीं तूं अरामी लोकांस हुंदडून त्यांचा नाश करशील. १२ सर्व संदेष्टे त्याच्याप्रमाणेंच भाषण करूं लागून म्हणाले, रामोथ-गिलादावर चढाई करून जा, यशस्वी हो; कारण परमेश्वर तें राजाच्या हातीं देईल. १३ जो जासूद मीखायास बोलावयास गेला होता तो त्यास म्हणाला, पाहा, सर्व संदेष्ट्यांचें एकमत होऊन ते राजासंबंधानें शुभवचन बोलत आहेत, तर त्यांच्याप्रमाणेंच तूंहि शुभसंदेश कथन करावा. १४ मीखाया म्हणाला, परमेश्वराच्या जीविताची शपथ, परमेश्वर जें कांहीं मला सांगेल तेंच मी बोलेन. १५ तो राजाकडे आला तेव्हां राजानें त्याला विचारिलें, हे मीखाया, आम्हीं रामोथ-गिलादाबरोबर युद्ध करावयास जावें कीं न जावें? त्यानें त्यास म्हटलें, जा, यशस्वी हो, परमेश्वर तें राजाच्या हातीं देईल. १६ राजा त्यास म्हणाला, परमेश्वराच्या नामानें मला खरें तेंच सांग, असें मीं तुला कितीदां शपथ घालून सांगावें? १७ मग तो म्हणाला, सर्व इस्राएल लोक मेंढपाळावांचून असलेल्या मेंढरांसारखे डोंगरांवरून विखरलेले आहेत असें मला दिसलें; तेव्हां परमेश्वर म्हणाला, यांस कोणी धनी नाहीं, तर हे आपआपल्या घरीं सुखरूप परत जावोत. १८ इस्राएलाचा राजा यहोशाफाटास म्हणाला, हा माझ्यासंबंधानें अनुकूल संदेश सांगावयाचा नाहीं तर प्रतिकूल सांगावयाचा

असें मीं आपणाला सांगितलें नाहीं काय ? १९ मीखाया
म्हणाला, तर आतां तूं परमेश्वराचें वचन ऐक: परमे-
श्वर आपल्या सिंहासनावर विराजमान झालेला व
त्याच्या उजवीकडे व डावीकडे स्वर्गांतील सर्व सेना
उभी आहे असें माझ्या दृष्टीस पडलें. २० परमेश्वर
म्हणाला, अहाबास असा कोण मोह घालील कीं तो
रामोथ-गिलादावर चाल करून तेथें पतन पावेल ?
तेव्हां कोणीं असें, कोणीं तसें, म्हटलें. २१ त्या
समयीं एक आत्मा जवळ येऊन परमेश्वरासमोर उभा
राहिला आणि म्हणाला, मी त्याला मोह घालितों.
२२ परमेश्वरानें विचारिलें, कसा ? तो म्हणाला, मी
जाऊन त्याच्या सर्व संदेष्ट्यांच्या मुखांत असत्य वद-
विणारा आत्मा होईन. परमेश्वर म्हणाला, तूं त्यास
मोह घालशील; जा, तुजकडून हें होईल; तसेंच कर.
२३ तर पाहा, परमेश्वरानें तुझ्या या सर्व संदेष्ट्यांच्या
मुखांत असत्य वदविणारा आत्मा संचरविला आहे;
तुझें अनिष्ट होणार असें परमेश्वर बोलला आहे.
२४ तेव्हां कनानाचा पुत्र सिद्कीया मीखायाजवळ
गेला, आणि त्याच्या तोंडांत मारून त्यानें त्याला विचारिलें,
परमेश्वराचा आत्मा मला सोडून तुझ्याशीं बोलण्यास
कोठून गेला ? २५ मीखाया त्यास म्हणाला, तूं लपा-
वयासाठीं घराच्या आंतल्या कोठडींत पळून जाशील
तेव्हां तुला कळेल. २६ मग इस्राएलाचा राजा
म्हणाला, नगराचा सुभेदार आमोन व राजपुत्र
योवाश यांजकडे मीखायास माघारीं घेऊन जा;
२७ आणि त्यांना सांगा, राजा म्हणतो, या मनुष्यास
बंदींत टाका व मी सुखरूप परत येईपर्यंत त्यास
शिक्षेचें अन्न व शिक्षेचें पाणी द्या. २८ मीखाया
म्हणाला, तूं सुखरूप परत आलास तर समजावें कीं
परमेश्वर माझ्याद्वारें बोललाच नाहीं. तो म्हणाला,
लोकहो, तुम्ही सर्व हें ऐका.

२९ नंतर इस्राएलाचा राजा व यहूदाचा राजा
यहोशाफाट यांनीं रामोथ-गिलादावर चढाई केली.
३० इस्राएलाच्या राजानें यहोशाफाटास सांगितलें, मी
वेष बदलून लढाईस जाणार; पण आपण आपलीं स्वतांचीं
वस्त्रें घाला. याप्रमाणें इस्राएलाचा राजा वेष बदलून
लढाईस गेला. ३१ अरामाच्या राजानें आपल्या
बत्तीस रथांच्या सरदारांस आज्ञा केली होती कीं लहान-
थोरांपैकीं कोणाशींहि लढूं नका, इस्राएलाच्या राजाशीं
मात्र लढा. ३२ त्या रथांच्या सरदारांनीं यहोशाफाटास
पाहिलें तेव्हां त्यांस वाटलें कीं हाच इस्राएलाचा राजा
असावा; म्हणून त्यांनीं त्याच्याशीं लढावयासाठीं मोर्चा
फिरविला; तेव्हां यहोशाफाटानें आरोळी ठोकली.
३३ रथांच्या सरदारांनीं हा इस्राएलाचा राजा नाहीं असें
पाहिलें तेव्हां त्याचा पिच्छा सोडून ते परतले. ३४ मग
कोणीएकानें सहजगत्या एक बाण सोडिला, तो जाऊन
इस्राएली राजाच्या चिलखताच्या सांध्यांत रुतला.
तेव्हां तो आपल्या सारथ्यास म्हणाला, मी घायाळ झालों
आहें, रथ फिरवून मला सैन्याच्या बाहेर घेऊन जा.
३५ त्या दिवशीं घनघोर युद्ध झालें; अराम्यांच्या मारापुढें
राजा आपल्या रथाला टेकून उभा होता; तो संध्याकाळीं
मरण पावला; त्याच्या घायाचें रक्त वाहून रथाच्या
बुडाशीं सांचलें. ३६ सूर्यास्ताच्या समयीं सर्व सैन्यांत
असा पुकारा झाला कीं प्रत्येकानें आपआपल्या नगराची
व आपआपल्या देशाची वाट धरावी. ३७ राजा मरण
पावल्यावर त्याला शोमरोनास नेलें; शोमरोन येथें त्यांनीं
त्यास मूठमाती दिली. ३८ राजाचा रथ शोमरोनाच्या तळ्या-
नजीक धुतला तेव्हां परमेश्वराच्या वचनाप्रमाणें कुत्र्यांनीं
येऊन त्याचें रक्त चाटून खाल्लें; ती वेश्यांची स्नान
करण्याची जागा होती. ३९ अहाबानें केलेल्या बाकीच्या
गोष्टी, त्यानें जें कांहीं केलें तें, त्यानें बांधिलेलें
हस्तिदंती गृह, त्यानें वसविलेलीं सर्व नगरें या सर्वांचें
वर्णन इस्राएलाच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं
काय ? ४० अहाब आपल्या पितरांजवळ जाऊन निजला,
आणि त्याचा पुत्र अहज्या त्याच्या जागीं राजा झाला.

४१ इस्राएलाचा राजा अहाब याच्या कारकीर्दीच्या
चौथ्या वर्षी आसाचा पुत्र यहोशाफाट यहूदावर राज्य
करूं लागला. ४२ यहोशाफाट राज्य करूं लागला तेव्हां
तो पस्तीस वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत पंचवीस
वर्षें राज्य केलें. त्याच्या आईचें नांव अजूबा; ती

घिल्हीची कन्या. ४३ त्याची सगळी चालचलणूक
त्याचा बाप आसा याच्याप्रमाणें होती; ती त्यानें
सोडिली नाहीं; परमेश्वराच्या दृष्टीनें जें बरें तें त्यानें
केलें; तथापि त्यानें उच्चस्थानें काढून टाकिलीं नाहींत;
लोक अजून त्या उच्चस्थानांवर यज्ञ करीत व धूप
जाळीत. ४४ यहोशाफाटानें इस्राएलाच्या राजाशीं
सल्ला केला. ४५ यहोशाफाटानें केलेल्या बाकीच्या गोष्टी,
त्यानें दाखविलेला पराक्रम, त्यानें केलेलीं युद्धें, या
सर्वांचें वर्णन यहूदांच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं
काय? ४६ त्याचा बाप आसा याच्या वेळीं जे पुरुषगामी
राहून गेले होते त्यांस त्यानें देशांतून घालवून दिलें.
४७ त्या काळीं अदोमांत कोणी राजा नव्हता; एक
मुतालीक राज्य चालवीत होता. ४८ सोनें आणण्या-
करितां ओफीर येथें जातां यावें म्हणून यहोशाफाटानें
तार्शीशी गलबतें बांधिलीं; तीं एसयोन-गेबेर येथें
फुटलीं, त्यामुळें तीं गेलीं नाहींत. ४९ तेव्हां अहाबाचा
पुत्र अहज्या हा यहोशाफाटास म्हणाला, माझे
सेवक आपल्या सेवकांबरोबर जहाजांतून जाऊं द्या; पण
यहोशाफाटानें नाहीं म्हटलें. ५० यहोशाफाट आपल्या
पितरांजवळ जाऊन निजला; त्यांनीं त्यास त्याच्या
पूर्वजांमध्यें, मूळपुरुष दावीद याच्या नगरामध्यें,
मूठमाती दिली; आणि त्याच्या जागीं त्याचा पुत्र
यहोराम राजा झाला.

५१ यहूदाचा राजा यहोशाफाट याच्या कारकीर्दीच्या
सतराव्या वर्षी अहाबाचा पुत्र अहज्या शोमरोन येथें
इस्राएलावर राज्य करूं लागला; त्यानें इस्राएलावर
दोन वर्षें राज्य केलें. ५२ परमेश्वराच्या दृष्टीनें जें
वाईट तें त्यानें केलें, त्याच्या आईबापांच्या आणि
इस्राएल लोकांच्या हातून पाप करविणारा नबाटाचा पुत्र
यराबाम याच्या मार्गानें तो चालला. ५३ आपल्या
बापाप्रमाणें त्यानें बालाच्या मूर्तीचें भजनपूजन करून
इस्राएलाचा देव परमेश्वर यास संतप्त केलें.

# २ राजे



१ अहाबाच्या मृत्यूनंतर मवाब इस्राएलावर
१ उलटला. २ अहज्या हा शोमरोनांतील आपल्या
वाड्याच्या माडीवरल्या खिडकीच्या जाळींतून खालीं
पडून दुखणाईत झाला; त्यानें जासुदांस अशी आज्ञा
केली कीं तुम्ही जाऊन एक्रोन येथील बाल-जबूब दैवतास
प्रश्न करा कीं मी या दुखण्यांतून बरा होईन काय?
३ इतक्यांत परमेश्वराचा देवदूत एलीया तिश्बी यास
म्हणाला, ऊठ, शोमरोनाच्या राजाच्या जासुदांस
जाऊन गांठ आणि विचार, तुम्ही एक्रोन एथील
बाल-जबूब दैवतास प्रश्न करावयास चालला आहां, तें
इस्राएलांत कोणी देव नाहीं म्हणून कीं काय? ४ यास्तव
परमेश्वर अहज्यास म्हणतो, ज्या पलंगावर तूं पडला
आहेस त्यावरून तूं उठावयाचा नाहींस; तूं अवश्य
मरशील. असें बोलून एलीया चालता झाला.
५ जासूद राजाकडे परत गेले तेव्हां त्यानें त्यांस
विचारिलें, तुम्ही परत आलां तें कां म्हणून?
६ त्यांनीं त्यास सांगितलें, एका मनुष्यानें आम्हांस
वाटेंत गांठून सांगितलें कीं ज्या राजानें तुम्हांस पाठविलें
आहे त्याजकडे परत जा व त्यास सांगा, परमेश्वर
म्हणतो, तूं एक्रोन येथलें दैवत बाल-जबूब यास प्रश्न
करावयास मनुष्य पाठविले तें इस्राएलांत कोणी देव
नाहीं म्हणून कीं काय? तर ज्या पलंगावर तूं पडला
आहेस त्यावरून तूं उठावयाचा नाहींस, तूं अवश्य मरशील;
७ त्यानें त्यांस विचारिलें, ज्या मनुष्यानें तुम्हांस
गांठून हें सर्व सांगितलें तो दिसण्यांत कसा होता?
८ ते म्हणाले, त्याच्या अंगांत केसांचा झगा होता व

त्याच्या कमरेस कातड्याचा कमरबंद होता. तो
म्हणाला, तो एलीया तिश्बीच. ९ यावर राजानें पन्नासां-
च्या एका नायकास पन्नास शिपाई देऊन एलीयाकडे
पाठविलें. एलीया होता तेथें जाऊन त्यानें पाहिलें तेव्हां
तो पर्वतशिखरावर बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. तो
त्यास म्हणाला, हे देवाच्या माणसा, राजाज्ञा आहे, खालीं
उतरून ये. १० एलीयानें त्या पन्नासांच्या नायकास
म्हटलें, मी देवाचा माणूस असलों तर आकाशांतून
अग्नीचा वर्षाव होऊन तो तुला व तुझ्या पन्नास
शिपायांस भस्म करो. तेव्हां आकाशांतून अग्नीचा
वर्षाव होऊन त्यानें त्यास व त्याच्या पन्नास शिपायांस
भस्म केलें. ११ मग राजानें त्याजकडे पुनः पन्नासां-
च्या एका नायकास पन्नास शिपाई देऊन पाठविलें;
तो येऊन त्यास म्हणाला, हे देवाच्या माणसा,
राजाज्ञा आहे, तूं लवकर खालीं उतरून ये. १२ एलीया
त्यास म्हणाला, मी देवाचा माणूस असेन तर आकाशां-
तून अग्नीचा वर्षाव होऊन तो तुला व तुझ्या पन्नास
शिपायांस भस्म करो. तेव्हां आकाशांतून अग्नीचा वर्षाव
होऊन त्यानें त्यास व त्याच्या पन्नास शिपायांस भस्म केलें.
१३ मग राजानें तिसऱ्यांदा पन्नासांच्या एका नायकास
पन्नास शिपाई देऊन पाठविलें. हा तिसऱ्या पन्नासांच्या
नायकानें जाऊन एलीयापुढें गुडघे टेकिले व विनवणी
करून म्हटलें, अहो देवाचे माणूस, माझा प्राण व ह्या
आपल्या पन्नास दासांचे प्राण आपल्या दृष्टीला मोलवान्
वाटोत; १४ पाहा, आकाशांतून अग्नीचा वर्षाव होऊन
पहिले दोन नायक व त्यांचे पन्नास पन्नास शिपाई भस्म
झाले, पण आतां माझा प्राण आपल्या दृष्टीस मोलवान्
वाटो. १५ परमेश्वराचा देवदूत एलीयास म्हणाला,
खालीं उतरून त्याच्याबरोबर जा, भिऊं नको. तेव्हां
एलीया उठून खालीं उतरून त्याच्याबरोबर राजाकडे
गेला. १६ त्यानें त्यास म्हटलें, एक्रोन येथलें दैवत
बाल-जबूब याला प्रश्न करावयास तूं जासूद पाठविले
तें इस्राएलांत देव नाहीं म्हणून कीं काय? यास्तव ज्या
बिछान्यावर तूं पडला आहेस त्यावरून तूं उठावयाचा
नाहींस; तूं अवश्य मरणार. १७ एलीयास सांगित-
लेल्या परमेश्वराच्या वचनाप्रमाणें तो मरण पावला.
त्याला पुत्र नव्हता म्हणून त्याच्या जागीं यहोराम
हा राजा झाला. यहूदाचा राजा यहोशाफाट याचा पुत्र
यहोराम याच्या कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षी हें झालें.
१८ अहज्यानें केलेल्या बाकीच्या गोष्टींचें वर्णन
इस्राएलाच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय?

१ परमेश्वरानें एलीयास वावटळीच्या द्वारें
२ स्वर्गास घेऊन जाण्याचा समय आला त्या वेळीं
एलीया अलीशाबरोबर गिल्गाल येथून चालला
होता. २ एलीया अलीशास म्हणाला, परमेश्वर मला
बेथेल येथें पाठवीत आहे; तर तूं एथेंच थांब. अलीशा
म्हणाला, परमेश्वराच्या व आपल्या जीविताची शपथ, मी
आपल्याला कधीं सोडावयाचा नाहीं; मग ते बेथेल येथें
गेले. ३ बेथेलांतल्या संदेष्ट्यांचे शिष्य अलीशाकडे येऊन
त्यास म्हणाले, आज परमेश्वर तुझ्या धन्यास तुझ्या
शिरावरून घेऊन जाणार आहे हें तुला ठाऊक आहे
काय? त्यानें म्हटलें, मला ठाऊक आहे, पुरें करा.
४ एलीया त्यास म्हणाला, अलीशा, परमेश्वर मला
यरीहोस पाठवीत आहे तर तूं येथें थांब. तो म्हणाला,
परमेश्वराच्या व आपल्या जीविताची शपथ, मी आपणाला
सोडावयाचा नाहीं; मग ते यरीहोस गेले.
५ यरीहोंतील संदेष्ट्यांचे शिष्य अलीशाकडे येऊन
त्यास म्हणाले, आज परमेश्वर तुझ्या धन्यास तुझ्या
शिरावरून घेऊन जाणार आहे हें तुला ठाऊक आहे
काय? त्यानें म्हटलें, मला ठाऊक आहे, पुरें करा.
६ एलीया त्यास म्हणाला, परमेश्वर मला यार्देनेकडे
पाठवीत आहे. तूं येथेंच थांब. तो म्हणाला,
परमेश्वराच्या व आपल्या जीविताची शपथ, मी आपणाला
सोडावयाचा नाहीं; मग ते दोघे पुढें चालले.
७ संदेष्ट्यांचे पन्नास शिष्य येऊन त्यांच्यासमोर दूर
उभे राहिले आणि ते दोघे यार्देनतीरीं उभे राहिले.
८ एलीयानें आपला झगा काढून त्याची वळकटी करून
ती पाण्यावर मारिली, तेव्हां पाणी दुभंग झालें व ते
दोघे कोरड्या भूमीवरून पलीकडे गेले. ९ ते पलीकडे
गेल्यावर एलीया अलीशास म्हणाला, मला तुजपासून

नेण्यांत येण्यापूर्वी मी तुजसाठीं काय करूं तें मला सांग.
अलीशा म्हणाला, आपल्या ठायीं असलेल्या आत्म्याचा
दुप्पट वांटा माझ्या ठायीं यावा. १० एलीया म्हणाला,
तूं दुर्घट गोष्ट मागतोस, पण मला तुजपासून घेऊन
जातील त्या समयीं मी तुला दिसलों तर तूं मागतोस तें
तुला प्राप्त होईल, न दिसलों तर प्राप्त होणार नाहीं.
११ ते बोलत चालले असतां, पाहा, एकाएकीं एक
अग्निरथ आणि अग्निवारु दृष्टीस पडले व त्यांनीं त्या
दोघांस अलग केलें; एलीया वावटळींतून स्वर्गास गेला.
१२ तें पाहून अलीशा मोठ्यानें म्हणाला, माझ्या
बापा! माझ्या बापा! इस्राएलाच्या रथांनो! इस्रा-
एलाच्या राउतांनो! तो पुनः त्याच्या नजरेस पडला
नाहीं. तेव्हां त्यानें आपलीं वस्त्रें फाडून त्यांचे दोन दोन
तुकडे केले. १३ एलीयाचा जो झगा त्याच्या अंगा-
वरून खालीं पडला होता तो त्यानें उचलून घेतला
आणि तो परत जाऊन यार्देनतीरीं उभा राहिला.
१४ एलीयाच्या अंगावरून पडलेला झगा पाण्यावर मारून
तो म्हणाला, एलीयाचा देव परमेश्वर कोठें आहे?
त्यानें तो पाण्यावर मारितांच पाणी दुभंग झालें आणि
अलीशा पलीकडे गेला. १५ यरीहो येथल्या संदेष्ट्यांचे
शिष्य त्याला लांबून पाहून म्हणाले, एलीयाचा आत्मा
अलीशाच्या ठायीं उतरला आहे. त्यांनीं सामोरे येऊन
त्यास जमिनीपर्यंत लवून नमन केलें. १६ ते त्यास
म्हणाले, ऐका, आपल्या सेवकांजवळ पन्नास बळकट पुरुष
आहेत; आपल्या स्वामीचा शोध करण्यास त्यांस जाऊं द्या;
परमेश्वराच्या आत्म्यानें त्यास उचलून एखाद्या पर्वतावर
अथवा एखाद्या खोऱ्यांत टाकिलें असेल. तो म्हणाला,
कोणास पाठवूं नका. १७ त्यांनीं त्यास एवढा आग्रह केला
कीं त्यांची त्याला भीड पडून तो म्हणाला, पाठवा. त्यांनीं
पन्नास पुरुष पाठविले. त्यांनीं त्याचा तीन दिवस
शोध केला पण त्यांस तो सांपडला नाहीं. १८ ते परत
आले तेव्हां तो यरीहो येथें होता; तो त्यांस म्हणाला,
जाऊं नका असें मीं तुम्हांस सांगितलें नव्हतें काय?

१९ त्या नगरचे रहिवासी अलीशास म्हणाले, पाहा,
हें नगर मनोहर स्थळीं वसलें आहे, हें आमच्या
स्वामीस दिसतच आहे; पण येथलें पाणी फार वाईट
असल्यामुळें जमिनींत कांहीं पिकत नाहीं. २० त्यानें
म्हटलें, एक नवें पात्र मजकडे आणा व त्यांत मीठ
घाला. त्यांनीं तें त्याजकडे आणिलें. २१ मग तो
पाण्याच्या झऱ्यानजीक गेला व त्यांत तें मीठ टाकून
म्हणाला, परमेश्वर म्हणतो, मी हें पाणी चांगलें करितों,
यापुढें यानें मृत्यु येणार नाहीं व पीक बुडणार नाहीं.
२२ अलीशाच्या या वचनानुसार तें पाणी चांगलें
झालें; तें आजवर तसेंच आहे.

२३ तो तेथून वरतीं बेथेलकडे चालला; तो वाट
चढून जात असतां नगरांतून कांहीं पोरें बाहेर येऊन
त्याची थट्टा करून म्हणालीं, अरे टकल्या, चालता हो.
२४ त्यानें मागें वळून त्यांजकडे पाहिलें व परमेश्वराचें
नाम घेऊन त्यांस शाप दिला, तेव्हां वनांतून दोन
अस्वली बाहेर पडल्या व त्यांनीं त्यांतल्या बेचाळीस
पोरांस फाडून टाकिलें. २५ तो तेथून निघून कर्मेल
पर्वताकडे आला आणि तेथून शोमरोनास माघारीं गेला.

३ १ यहूदाचा राजा यहोशाफाट याच्या कारकीर्दी-
च्या अठराव्या वर्षी अहाबाचा पुत्र यहोराम शोम-
रोनांत राज्य करूं लागला; त्यानें बारा वर्षें राज्य केलें.
२ परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें केलें, तरी
आपल्या आईबापांइतकें केलें नाहीं; कारण त्याच्या
बापानें केलेला बालमूर्तीचा स्तंभ त्यानें काढून टाकिला.
३ तरी जीं पापकर्में नबाटाचा पुत्र यराबाम यानें इस्रा-
एलाकडून करविलीं त्याचें त्यानें अवलंबन केलें; तीं
त्यानें सोडिलीं नाहींत.

४ मवाबाचा राजा मेशा हा मेंढरांचे कळप
बाळगून होता; तो इस्राएलाच्या राजास एक लाख
कोकरांची व एक लाख एडक्यांची लोकर खंडणी म्हणून
देत असे. ५ अहाब मेल्यावर मवाबाचा राजा इस्रा-
एलाच्या राजावर उलटला. ६ त्या समयीं यहोराम
राजानें शोमरोनांतून बाहेर निघून सर्व इस्राएलाची
जमवाजमव केली. ७ त्यानें जाऊन यहूदाचा राजा यहो-
शाफाट यास असा निरोप पाठविला कीं मवाबाचा
राजा मजवर उलटला आहे, तर त्याच्याशीं लढावयास

आपण मजबरोबर येतां काय? तो म्हणाला, होय, मी
येतों; आपण आणि मी एकच; माझे लोक ते आपले लोक,
माझे घोडे ते आपले घोडे. ८ त्यानें विचारिलें, कोणत्या
मार्गानें आपण जावें? त्यानें म्हटलें, अदोमी
रानाच्या वाटेनें. ९ त्याप्रमाणें इस्राएलाचा राजा,
यहूदाचा राजा आणि अदोमाचा राजा यांनीं कूच केलें;
त्यांनीं वळसा घेऊन सात मजला केल्यानंतर सर्व
सेना व त्यांच्याबरोबर असलेलीं जनावरें यांस
पिण्यास पाणी मिळेना. १० तेव्हां इस्राएलाचा राजा
म्हणाला, अरेरे! ह्या तिघां राजांना मवाबाच्या हातीं
द्यावें म्हणूनच परमेश्वरानें त्यांस एकवट केलें आहे.
११ तेव्हां यहोशाफाट म्हणाला, ज्याच्याद्वारें आपणांस
परमेश्वराला प्रश्न करितां येईल असा परमेश्वराचा
कोणी संदेष्टा येथें नाहीं काय? इस्राएलाच्या राजाच्या
सेवकांपैकीं एकानें सांगितलें, एलीयाच्या हातावर
पाणी घालणारा शाफाटाचा पुत्र अलीशा येथें आहे.
१२ यहोशाफाट म्हणाला, परमेश्वराचें वचन त्याला
प्राप्त होत असतें. मग इस्राएलाचा राजा, यहोशाफाट
व अदोमाचा राजा हे त्याजकडे गेले. १३ अलीशा
इस्राएलाच्या राजास म्हणाला, मला तुझ्याशीं काय
कर्तव्य आहे? तूं आपल्या बापाच्या, आपल्या आईच्या
संदेष्ट्यांकडे जा. इस्राएलाचा राजा त्यास म्हणाला, नाहीं,
नाहीं; ह्या तीन राजांना मवाबाच्या हातीं द्यावें म्हणून पर-
मेश्वरानें त्यांस एकवट केलें आहे. १४ अलीशा म्हणाला,
ज्याच्या हुजुरास मी असतों त्या सेनाधीश परमेश्वराच्या
जीविताची शपथ; येथें असलेला यहूदाचा राजा
यहोशाफाट याला मी मान देत नसतों तर मीं तुजकडे
ढुंकूनहि पाहिलें नसतें. १५ आतां एकादा वाजंत्री
घेऊन या. वाजंत्री वाद्य वाजवीत असतां परमेश्वराचा
हस्त अलीशावर आला. १६ तो म्हणाला, परमे-
श्वर असें म्हणतो, या खोऱ्यांत जिकडेतिकडे खळगे
खणा. १७ परमेश्वर म्हणतो, कांहीं वादळ किंवा
पर्जन्य तुमच्या दृष्टीस न पडतां हें खोरें पाण्यानें
भरून जाईल; आणि तुम्ही, तुमचीं पाठाळें आणि
जनावरें पाणी पितील. १८ परमेश्वराच्या दृष्टीनें
ही केवळ क्षुल्लक गोष्ट आहे; तो मवाबी लोकांस
तुमच्या हातीं देईल; १९ तेव्हां तुम्ही प्रत्येक तटबंदी
नगराचा व प्रत्येक निवडक नगराचा विध्वंस करा;
चांगला वृक्ष असेल तेवढा तोडा; सर्व पाण्याचे कूप
बुजवून टाका व दगड टाकून सर्व उत्तम शेतांची
नासाडी करा. २० सकाळच्या प्रहरीं अन्नबलि अर्पण
करण्याच्या समयीं अदोमाच्या दिशेनें पाणी वाहत
आलें व तो सर्व प्रदेश जलमय झाला. २१ राजे
एकवट होऊन आपल्याशीं लढाई करण्यास येत
आहेत हें मवाबी लोकांनीं ऐकलें तेव्हां जितके मवाबी
लढाईला कमर बांधण्यास लायक होते तितके व
त्यांहून अधिक वयाचे सगळे एकवट होऊन सीमेवर
उभे राहिले. २२ दुसऱ्या दिवशीं ते पहांटेस उठले
आणि सूर्याचे किरण त्या पाण्यावर पडल्यामुळें मवाबी
लोकांस तें दुरून रक्तासारखें भासलें. २३ ते म्हणाले,
तें रक्तच आहे; त्या राजांचा नाश झाला आहे; त्यांनीं
एकमेकांस मारून टाकिलें आहे यांत संशय नाहीं.
तर मवाब्यांनो, लूट करावयास चला. २४ मवाबी
इस्राएलाच्या छावणीनजीक आले तेव्हां इस्राएलांनीं उठून
त्यांस मार दिला; आणि ते त्यांच्या पुढून पळाले; इस्राएल
त्यांस मारीत मारीत त्यांच्या देशांत शिरले. २५ त्यांनीं
नगरांचा विध्वंस केला; सर्व चांगल्या चांगल्या शेतांत
प्रत्येक पुरुषानें दगड फेकिले, त्यांनीं तीं दगडांनीं
भरून टाकिलीं; पाण्याचे सर्व कूप बुजविले, सर्व चांगलीं
झाडें तोडून टाकिलीं; कीर-हरेसेथ येथें त्यांनीं दगडां-
शिवाय कांहींएक राहूं दिलें नाहीं; गोफणदारांनीं घेरून
त्याचा विध्वंस केला. २६ युद्धांत आपण अगदीं जेर
झालों असें मवाबाच्या राजानें पाहिलें तेव्हां त्यानें
सातशें धारकरी बरोबर घेऊन अदोमाच्या राजाकडे
जाण्यासाठीं घेरा फोडण्याचा यत्न केला, पण त्याचें कांहीं
चाललें नाहीं. २७ तेव्हां त्यानें आपला ज्येष्ठ पुत्र युवराज
यास नेऊन तटावर त्याचा होम केला. यावरून इस्राएला-
वर फार कोप झाला व ते त्याला सोडून स्वदेशीं परत गेले.

४ १ एकदा संदेष्ट्यांच्या शिष्यांच्या स्त्रियांपैकीं एकीनें
अलीशाकडे गाऱ्हाणें केलें; ती म्हणाली, तुझा सेवक,
माझा नवरा, मरून गेला आहे; तुला ठाऊक आहे
कीं तो परमेश्वराचें भय बाळगणारा होता. त्याचा
सावकार माझ्या दोन पुत्रांस दास करून नेण्यास आला
आहे. २ अलीशानें तिला विचारिलें, मी तुजसाठीं
काय करूं हें मला सांग; तुझ्या घरांत काय काय आहे?
ती म्हणाली, एक घडा तेलाशिवाय आपल्या दासीच्या
घरांत कांहींएक नाहीं. ३ तो तिला म्हणाला, तूं जा
आणि बाहेरून आपल्या शेजाऱ्यांपाजाऱ्यांकडून
बरींचशीं रिकामीं भांडीं मागून आण. ४ मग
आपल्या पुत्रांसह घरांत जाऊन दार बंद कर व त्या
सर्व भांड्यांत तेल ओत; आणि भांडें भरेल तें
बाजूला ठेव. ५ ती त्याजपासून गेली आणि आपल्या
पुत्रांसह आपल्या घरांत जाऊन तिनें दार बंद केलें;
ते निजकडे भांडीं आणीत तीं ती भरीत जाई.
६ सर्व भांडीं भरल्यावर ती आपल्या पुत्रांस म्हणाली,
मला आणखी एक भांडें आणून द्या; त्यांनीं म्हटलें,
आतां एकहि भांडें उरलें नाहीं; तेव्हां तेल वाढावयाचें
राहिलें. ७ तिनें जाऊन देवाच्या माणसास हें सांगितलें.
तो म्हणाला, जा, तेल विकून आपलें कर्ज फेड व जें
शिल्लक राहील त्यावर आपला व आपल्या पुत्रांचा
निर्वाह कर.

८ एके दिवशीं असें झालें कीं अलीशा शूनेम येथें
गेला; तेथें एक थोर स्त्री राहत होती; तिनें त्यास
आग्रह करून जेवावयास लाविलें. पुढें तो त्या वाटेनें
जाई तेव्हां तेथें जेवावयास उतरत असे.
९ ती आपल्या नवऱ्यास म्हणाली, हा पुरुष वारंवार
या वाटेनें जातो, हा कोणी देवाचा पवित्र माणूस
आहे असें मला दिसतें. १० यास्तव धाब्यावर आपण
एक लहानशी खोली करूं आणि त्याच्यासाठीं एक
खाट, एक मेज, एक खुर्ची व एक समई अशीं तिच्यांत
ठेवूं, म्हणजे तो आपल्याकडे येईल तेव्हां
त्या खोलींत उतरत जाईल. ११ एके दिवशीं असें झालें कीं
तो तेथें येऊन त्या खोलींत उतरला व तेथें निजला.
१२ त्यानें आपला सेवक गेहजी यास म्हटलें, त्या शुनेम-
करिणीस बोलावून आण. त्यानें तिला बोलाविलें, आणि
ती येऊन त्याच्यापुढें उभी राहिली. १३ तो त्या
सेवकास म्हणाला, तूं हिला म्हण, तूं आमची निगा
करण्यांत एवढी मोठी तत्परता दाखविली; तुझ्याप्रीत्यर्थ
मीं काय करावें? राजाकडे किंवा सेनापतीकडे तुझी
शिफारस करूं काय? ती म्हणाली, मी आपल्या
लोकांत नांदत आहें. १४ त्यानें आपल्या सेवकाला
विचारिलें, हिच्याप्रीत्यर्थ काय करावें? गेहजी म्हणाला,
तिला कांहीं मूलबाळ नाहीं; तिचा नवरा वृद्ध आहे.
१५ त्यानें म्हटलें, तिला बोलाव. त्यानें बोलावल्यावर ती
येऊन दारीं उभी राहिली. १६ तो तिला म्हणाला,
वसंतऋतु पुनरपि येईल तेव्हां तूं पुत्रास
उराशीं धरिशील. ती म्हणाली, छे, छे, माझे स्वामी,
देवाचे माणूस, आपल्या दासीची वंचना करूं
नका. १७ पुढें अलीशानें सांगितल्याप्रमाणें त्या स्त्रीस
गर्भ राहिला आणि वसंतऋतु पुनरपि आला
तेव्हां तिला पुत्र झाला. १८ तो मुलगा वाढून
मोठा झाल्यावर एके दिवशीं लोक पिकाची कापणी
करीत होते, तेथें तो बाहेर कापणाऱ्यांकडे आपल्या
बापाजवळ गेला. १९ तो आपल्या बापास म्हणाला,
अरेरे! माझें डोकें! माझें डोकें! त्यानें आपल्या
चाकरास सांगितलें, यास त्याच्या आईकडे उचलून ने.
२० त्यानें त्यास त्याच्या आईकडे नेलें; तो दोन प्रहर-
पर्यंत तिच्या मांडीवर होता आणि मग मृत्यु पावला.
२१ तेव्हां तिनें त्यास वरतीं नेऊन देवाच्या
माणसाच्या खाटेवर ठेविलें, व दार बंद करून
घेऊन ती खालीं उतरली. २२ आपल्या नवऱ्यास
हाक मारून ती म्हणाली, एक नोकर व एक गाढव
लवकर मजकडे पाठवून द्या, म्हणजे मी देवाच्या
माणसाकडे झटकन जाऊन येतें. २३ तो म्हणाला, तूं
आज त्याजकडे कां चाललीस? आज कांहीं चंद्रदर्शन
किंवा शब्बाथ नाहीं. ती म्हणाली, कांहीं चिंता नाहीं.
२४ गाढवावर खोगीर घालून ती बसली आणि
नोकरास म्हणाली, तूं हें एकसारखें हाकीत ने; मीं

सांगितल्यावांचून तूं हाकण्याचें सोडूं नको. २५ मार्ग
क्रमितां क्रमितां ती कर्मेल पर्वतावर देवाच्या माणसा-
जवळ जाऊन पोहंचली. तिला दुरून पाहून देवाचा
माणूस आपला सेवक गेहजी यास म्हणाला, ती पाहा,
शुनेमकरीण; २६ धाव, तिला सामोरा जा आणि तिला
विचार, तूं खुशाल आहेस ना? तुझा नवरा खुशाल
आहे ना? मूल खुशाल आहे ना? तिनें म्हटलें, सर्व
खुशाल आहेत. २७ डोंगर चढून देवाच्या माणसापाशीं
आल्यावर तिनें त्याचे पाय धरिले. गेहजी तिला एकी-
कडे लोटावयास जवळ गेला तेव्हां देवाचा माणूस
त्यास म्हणाला, तिला हात लावूं नको, तिचें मन व्याकुळ
झालें आहे; परमेश्वरानें ही गोष्ट मजपासून लपविली
आहे, कळविली नाहीं. २८ ती म्हणाली, मीं स्वामीकडे
पुत्राचा वर मागितला होता काय? माझी वंचना करूं
नका असें मीं म्हटलें होतें ना? २९ तेव्हां अलीशा
गेहजीस म्हणाला, कमर बांध आणि माझी काठी हातीं
घेऊन नीघ; वाटेनें कोणी भेटल्यास सलाम करूं नको;
कोणी सलाम केल्यास त्यास उलट सलाम करूं नको.
माझी काठी नेऊन त्या मुलाच्या तोंडास लाव. ३०
तेव्हां त्या मुलाची आई म्हणाली, परमेश्वराच्या व आपल्या
जीविताची शपथ, मी आपल्याला सोडावयाची नाहीं.
तेव्हां तो उठून तिच्यामागून चालला; ३१ गेहजीनें पुढें
जाऊन त्या मुलाच्या तोंडास काठी लाविली, पण त्यानें
आवाज किंवा हालचाल केली नाहीं. तो अलीशाकडे परत
येऊन म्हणाला, मूल कांहीं जागें होत नाहीं. ३२ अलीशा
घरांत आला तेव्हां मूल मरून आपल्या खाटेवर पडलें
आहे असें त्यानें पाहिलें. ३३ मग त्यानें एकट्यानें आंत
जाऊन दार लावून घेतलें व परमेश्वराची प्रार्थना केली.
३४ माडीवर जाऊन त्या मुलावर पडून त्यानें आपलें तोंड
त्याच्या तोंडाला, आपले डोळे त्याच्या डोळ्यांना,
आपले हात त्याच्या हातांना लाविले; त्याच्यावर
त्यानें पाखर घातली तेव्हां मुलाच्या देहास ऊब आली.
३५ मग त्याला सोडून तो घरांत इकडेतिकडे फिरूं
लागला; व पुनः वर चढून त्या मुलावर त्यानें पाखर
घातली तेव्हां मुलानें सात वेळां शिंकून डोळे उघडिले.
३६ तेव्हां त्यानें गेहजीस हाक मारून सांगितलें, त्या
शुनेमकरिणीस बोलाव. त्यानें बोलाविल्यावर ती
त्याजकडे आली; तो तिला म्हणाला, आपल्या पुत्राला
उचलून घे. ३७ ती आंत जाऊन त्याच्या पायां पडली,
त्याला जमिनीपर्यंत लवून तिनें नमन केलें; नंतर ती
आपल्या मुलास घेऊन बाहेर गेली.

३८ अलीशा पुनः गिल्गालास गेला तेव्हां देशांत
दुष्काळ पडला होता, आणि संदेष्ट्यांचे शिष्य त्याच्या-
समोर बसले असतां त्यानें आपल्या सेवकांस सांगितलें,
चुलीवर मोठें बहुगुणें ठेवून संदेष्ट्यांच्या शिष्यांसाठीं
शाकभाजी रांध. ३९ तेव्हां एक माणूस बाहेर रानांत
शाकभाजी गोळा करावयास गेला असतां त्याला एक
रानवेल सांपडली; तिच्यावरील कडू इंद्रायणें तोडून त्यानें
ओटींत भरून आणिलीं; तीं चिरून त्या शाकभाजीच्या
बहुगुण्यांत घातलीं; तीं कडू होतीं हें त्यास ठाऊक
नव्हतें. ४० त्यांनीं तीं भांड्यांतून काढून त्या माणसांस
वाढिलीं. तीं खातांच लोक ओरडून म्हणाले, देवाच्या
माणसा, बहुगुण्यांत मरण आहे. त्यांच्यानें तें
खाववेना. ४१ अलीशा म्हणाला, थोडें सपीठ आण,
तें त्यानें त्या बहुगुण्यांत टाकून त्यांस म्हटलें, आतां
ह्या लोकांना तें वाढा म्हणजे ते तें खातील. मग त्या
बहुगुण्यांत कांहीं अपायकारक पदार्थ राहिला नाहीं.

४२ बाल-शालीशा येथला कोणी मनुष्य आपल्या
प्रथम उपजांतील जवाच्या वीस भाकरी आणि धान्याचीं
हिरवीं कणसें पोत्यांतून देवाच्या माणसाकडे घेऊन
आला. अलीशा त्यास म्हणाला, या माणसांस हें वांटून
दे, त्यांना हें खाऊं दे. ४३ त्याचा सेवक म्हणाला, काय!
शंभर माणसांस एवढेंसें वांटून देऊं? तो म्हणाला, हें
लोकांस वांटून दे; त्यांना हें खाऊं दे; परमेश्वर
म्हणतो, त्यांनीं खाल्ल्यावर ह्यांतून कांहीं उरेलहि. ४४ तेव्हां
त्यानें तें लोकांस वाढिलें आणि परमेश्वराच्या वचना-
प्रमाणें त्यांनीं तें खाल्ल्यावर कांहीं उरलें.

५ १ अरामाच्या राजाचा सेनापति नामान हा
आपल्या धन्याच्या पदरचा एक थोर व प्रतिष्ठित
मनुष्य होता; कारण त्याच्याद्वारें परमेश्वरानें अरामास

जय दिला होता. तो पराक्रमी वीर होता, पण
कोडी होता. २ अरामी लोकांनीं टोळ्या करून छापा
घातला, आणि इस्राएल देशांतून एक लहान मुलगी
कैद करून नेली; ती नामानाच्या स्त्रीच्या सेवेस राहिली.
३ ती आपल्या धनिणीस म्हणाली, शोमरोनांतल्या
संदेष्ट्याशीं माझ्या धन्याची गांठ पडती तर किती बरें
होतें? त्यानें त्याचें कोड बरें केलें असतें. ४ कोणी-
एकानें जाऊन आपल्या धन्यास सांगितलें कीं ती
इस्राएल मुलगी असें असें म्हणत आहे. ५ अरामाच्या
राजानें म्हटलें, जा तर मग, मी इस्राएलाच्या राजास
पत्र देतों. मग तो पुरुष दहा किक्कार चांदी, सोन्याचीं
सहा हजार नाणीं व दहा पोषाक घेऊन निघाला.
६ त्यानें इस्राएलाच्या राजास पत्र आणिलें; त्यांत असा
मजकूर होता कीं ह्या पत्राच्या द्वारें आपणाला कळविण्यांत
येत आहे कीं नामान नांवाच्या माझ्या सेवकाला मीं
आपणाकडे पाठविलें आहे, आपण त्याचें कोड बरें करा.
७ हें पत्र वाचून इस्राएलाच्या राजानें आपलीं वस्त्रें
फाडिलीं; तो म्हणाला, या मनुष्यानें कोड बरें करण्या-
साठीं मजकडे हा माणूस पाठविला आहे; मरण व जीवन
देणारा मी देव आहें काय? पाहा, विचार करा; हा
मजशीं भांडण करण्याचें कांहीं तरी निमित्त पाहत
आहे. ८ इस्राएलाच्या राजानें आपलीं वस्त्रें फाडिलीं
हें देवाचा माणूस अलीशा यानें ऐकलें तेव्हां त्यानें
राजास सांगून पाठविलें, तूं आपलीं वस्त्रें कां
फाडिलीं? त्यानें मजकडे यावें, म्हणजे इस्राएलांत
संदेष्टा आहे हें त्याला कळेल. ९ तेव्हां नामान घोड्यां-
रथांनिशीं अलीशाच्या दारीं जाऊन उभा राहिला.
१० अलीशानें एका जासुदाच्या हातीं त्यास सांगून
पाठविलें कीं जाऊन यार्देनेंत सात वेळां स्नान कर म्हणजे
तुझें शरीर पूर्वीसारखें होऊन तूं शुद्ध होशील. ११ हें
ऐकून नामान रागावून चालता झाला; तो म्हणाला, पाहा,
मला वाटलें होतें, तो स्वतः मजकडे बाहेर येईल
आणि उभा राहून आपला देव परमेश्वर याचें नाम
घेईल आणि रोगाच्या ठिकाणीं हात फिरवून माझें
कोड बरें करील. १२ दिमिष्कांतल्या नद्या अबाना
व परपर ह्या इस्राएलाच्या सर्व जलाशयांपेक्षां उत्तम
नाहींत काय? त्यांत स्नान करून मला शुद्ध होतां
यावयाचें नाहीं काय? असें म्हणून तो क्रोधाविष्ट होऊन
निघून गेला. १३ मग त्याचे सेवक त्याच्याकडे येऊन
म्हणाले, बाबा, संदेष्ट्यानें आपल्याला कांहीं अवघड
काम सांगितलें असतें तर आपण केलें नसतें काय? तर
स्नान करून शुद्ध व्हा, एवढेंच त्यानें आपल्याला सांगितलें, तें
आपण कां करूं नये? १४ मग त्यानें देवाच्या माणसाच्या
सांगण्याप्रमाणें यार्देनेंत जाऊन सात वेळां बुचकळ्या मारिल्या
तेव्हां त्याचें शरीर लहान मुलाच्या शरीरासारखें
होऊन तो शुद्ध झाला. १५ नंतर तो बरोबरची सर्व मंडळी
घेऊन देवाच्या माणसाकडे परत गेला व त्याच्यासमोर
उभा राहून म्हणाला, अखिल पृथ्वींत इस्राएलाबाहेर
देव नाहीं हें मला आतां कळून आलें आहे; तर आतां
आपल्या सेवकाचा नजराणा स्वीकारावा. १६ तो म्हणाला,
ज्या परमेश्वराच्या हुजुरास मी असतों त्याच्या
जीविताची शपथ, मी कांहींएक घेणार नाहीं. त्यानें त्यास
पुष्कळ आग्रह केला तरी तो कांहीं घेईना. १७ तेव्हां
नामान म्हणाला, एवढी तरी निदान कृपा करा कीं
आपल्या दासाला दोन खेचरांच्या ओझ्याची माती द्या;
कारण यापुढें आपला सेवक परमेश्वराशिवाय दुसऱ्या
कोणत्याहि देवांस होमबलि अर्पिणार नाहीं कीं यज्ञ
करणार नाहीं. १८ परमेश्वरानें आपल्या दासाला एका
गोष्टीची मात्र क्षमा करावी; म्हणजे माझा धनी रिम्मोन-
देवताच्या मंदिरांत पूजा करावयास जातो तेव्हां मी
त्याच्याजवळ असतों, आणि रिम्मोनदेवताच्या मंदिरांत
गेल्यावर त्यास मी नमन करीत असतों; ह्याप्रमाणें
रिम्मोनाच्या मंदिरांत जाऊन मी त्यास नमन करीन
तेव्हां परमेश्वरानें आपल्या दासाला क्षमा करावी. १९ तो
त्यास म्हणाला, आतां सुखानें मार्गस्थ हो. तो तेथून
निघून थोडी वाट चालून गेला.

२० इकडे देवाचा माणूस अलीशा याचा चाकर
गेहजी यानें विचार केला कीं अरामी नामानानें
आणिलेला नजराणा माझ्या धन्यानें न घेण्यानें

१ निर्गम २५: ३९ टीप पाहा.

त्याजवर दया केली; परमेश्वराच्या जीविताची शपथ,
मी त्याच्यामागून धावत जाऊन त्याजपासून कांहीं तरी
घेतोंच. २१ मग गेहजी नामानाच्या मागून गेला.
आपल्यामागून कोणी धावत येत आहे हें नामानानें
पाहिलं तेव्हां त्यानें आपल्या रथावरून उतरून त्यास
सामोरें जाऊन विचारिलें, सर्व कांहीं ठीक आहे ना?
२२ गेहजी म्हणाला, सर्व कांहीं ठीक आहे. माझ्या
धन्यानें आपल्याला असें सांगावयास मला पाठविलें आहे कीं
पाहा, एफ्राइमाच्या डोंगरी प्रदेशांतून संदेष्ट्यांचे दोन
शिष्य माझ्या येथें नुकतेच आले आहेत, त्यांच्या-
साठीं एक किक्कार चांदी व दोन पोषाक द्या.
२३ नामान म्हणाला, कृपा करून दोन किक्कार घे.
त्यानें आग्रह करून दोन किक्कार चांदीच्या दोन थैल्या
बांधून दोन पोषाकांसह आपल्या दोन सेवकांच्या
खांद्यांवर ठेविल्या; हें सर्व घेऊन ते त्याच्यापुढें
चालले. २४ तो टेकडीनजीक येऊन पोहंचला तेव्हां
त्यानें त्या वस्तु त्यांच्या हातून घेऊन आपल्या घरीं
ठेवून दिल्या आणि त्या मनुष्यांस जा म्हणून सांगितलें;
मग ते निघून गेले. २५ त्याप्रमाणें तो आंत जाऊन
आपल्या धन्यापुढें उभा राहिला. अलीशा त्यास म्हणाला,
गेहजी, तूं कोठून आलास? त्यानें म्हटलें, आपला दास
कोठेंहि गेला नव्हता. २६ तो त्यास म्हणाला, तो
पुरुष तुला भेटावयासाठीं आपल्या रथावरून उतरून
मागें फिरला तेव्हां माझें लक्ष तिकडे गेलें नव्हतें
काय? चांदी, वस्त्रें, जैतुनांचे बाग, द्राक्षाचे मळे, शेरडें-
मेंढरें, गुरेंढोरें, दासदासी घेण्याचा हा समय आहे
काय? २७ तर नामानाचें कोड तुला व तुझ्या संतानाला
निरंतर लागून राहील. तेव्हां तो बर्फासारखा पांढरा
कोडी होऊन त्याच्यापुढून चालता झाला.

६ १ संदेष्ट्यांच्या शिष्यांनीं अलीशास म्हटलें,
पाहा, आम्ही आपल्यासमोर राहत आहों तें स्थल
फार संकुचित आहे. २ तर यार्देनतीरीं जाऊन
तेथून एकाएकानें एकएक तुळई आणून राहण्यासाठीं एक
आश्रम बांधावा म्हणून आम्हांला परवानगी द्या. त्यानें
म्हटलें, बरें, जा. ३ एकानें त्यास म्हटलें, कृपा करून
आपण आपल्या सेवकांबरोबर या. तो म्हणाला, बरें,
येतों. ४ तो त्यांच्याबरोबर गेला. ते यार्देनेपाशीं येऊन
लाकडें तोडूं लागले. ५ एक जण तुळई तोडून पाडीत
असतां कुऱ्हाड दांड्यांतून निसटून पाण्यांत पडली
तेव्हां तो ओरडून म्हणाला, हाय! हाय! स्वामी, मीं ती
मागून आणिली होती. ६ देवाच्या माणसानें विचारिलें,
ती कोठें पडली? त्यानें ती जागा दाखविल्यावर
अलीशानें एक लाकूड तोडून तेथें टाकिलें तेव्हां
लोखंड पाण्यावर तरंगूं लागलें. ७ त्यानें म्हटलें, ती
काढून घे; मग त्यानें हात लांब करून ती घेतली.

८ मग अरामाच्या राजानें इस्राएलाबरोबर युद्ध
आरंभिलें; त्यानें आपल्या सेवकांबरोबर अशी मसलत
केली कीं अमुक अमुक ठिकाणीं आपण तळ द्यावा.
९ तेव्हां देवाच्या माणसानें इस्राएलाच्या राजाला
सांगून पाठविलें: सावध राहा; अमुक अमुक ठिकाणीं
जाऊं नको; तेथें अरामी लोक चढाई करून येणार
आहेत. १० तेव्हां ज्या ठिकाणीं जाऊं नको अशी
सूचना इस्राएलाच्या राजास देवाच्या माणसानें
केली होती तेथें त्यानें लोक पाठविले. असा आपला
बचाव त्यानें एकदोनदाच नव्हे तर अनेकदा केला.
११ यावरून अरामाच्या राजाचें मन संतापलें; त्यानें
आपल्या सेवकांस बोलावून विचारिलें, आपल्यांतला
कोण इस्राएलाच्या राजाच्या पक्षाचा आहे हें तुम्ही
मला दाखवून देणार नाहीं काय? १२ त्याच्या एका
सेवकानें त्यास सांगितलें, माझे स्वामीराज, असा
कोणी नाहीं; पण आपण शयनगृहांत बोलतां ते शब्द
इस्राएलांतला संदेष्टा अलीशा हा इस्राएलाच्या राजास
कळवितो. १३ त्यानें म्हटलें, तो कोठें आहे तें
पाहा, म्हणजे मी माणूस पाठवून त्यास पकडून आणितों.
मग तो दोथान येथें आहे अशी त्यास बातमी लागली.
१४ तेव्हां त्यानें घोडे व रथ बरोबर देऊन तेथें मोठें
सैन्य पाठविलें; त्यांनीं रातोरात येऊन नगर वेढिलें.
१५ सकाळीं देवाच्या माणसाचा सेवक उठून बाहेर
आला तेव्हां सैन्यानें घोडे व रथ यांसह नगरास वेढा
दिला आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. तो आपल्या

धन्यास म्हणाला, स्वामी, हाय ! हाय ! आतां आपण
काय करावें ? १६ तो म्हणाला, भिऊं नको; त्यांच्या
पक्षाचे आहेत त्यांहून अधिक आपल्या पक्षाचे आहेत.
१७ अलीशानें प्रार्थना केली कीं हे परमेश्वरा, याचे
डोळे उघड, याला दृष्टि दे. परमेश्वरानें त्या तरुणाचे
डोळे उघडिले, तों पाहा, अलीशाच्या सभोवतालचा
डोंगर अग्नीचे घोडे व रथ यांनीं व्यापून गेला आहे
असें त्यास दिसलें. १८ अरामी लोक अलीशावर
चालून आले तेव्हां त्यानें परमेश्वराची प्रार्थना केली कीं
या लोकांस अंधळे कर. अलीशाच्या म्हणण्याप्रमाणें
त्यानें त्यांस अंधळें केलें. १९ अलीशा त्यांस म्हणाला,
हा नव्हे तो रस्ता व हें नव्हे तें शहर; माझ्यामागून
या म्हणजे ज्या मनुष्याचा तुम्ही शोध करीत आहां
त्याजकडे मी तुम्हांस घेऊन जातों. मग तो त्यांस
शोमरोनांत घेऊन गेला. २० ते शोमरोनांत आल्यावर
अलीशा म्हणाला, परमेश्वरा, या लोकांचे डोळे उघड,
यांस दिसूं दे. परमेश्वरानें त्यांचे डोळे उघडिले व
त्यांस दिसूं लागलें; तेव्हां आपण शोमरोनामध्यें आहों
असें त्यांस दिसलें. २१ त्यांस पाहून इस्राएलाचा राजा
अलीशास म्हणाला, बाबा, मी यांस मारून टाकूं काय ?
२२ त्यानें म्हटलें, यांस मारूं नको; तरवार व धनुष्य
यांनीं पाडाव केलेल्यांस तूं मारून टाकीत असतोस
काय ? यांच्यापुढें अन्नपाणी वाढ; यांना खाऊनपिऊन
आपल्या धन्याकडे परत जाऊं दे. २३ मग त्यानें
त्यांस मोठी मेजवानी दिली; त्यांचें खाणेंपिणें
आटोपल्यावर त्यानें त्यांस निरोप दिला; आणि ते
आपल्या धन्याकडे गेले. अरामी लोकांच्या टोळ्या
इस्राएल देशावर पुनः आल्या नाहींत.
२४ यानंतर अरामाचा राजा बेन-हदाद यानें
आपलें सर्व सैन्य एकवट करून शोमरोनावर स्वारी
करून त्यास वेढा घातला. २५ तेव्हां शोमरोनांत जबर
महागाई झाली; वेढा एवढा भारी पडला कीं गाढवाच्या
एका मुंडक्यास ऐंशीं रुपये आणि कबुतराच्या पावशेर
विष्ठेस पांच रुपये पडूं लागले. २६ इस्राएलाचा राजा
तटावर फिरत असतां एका स्त्रीनें ओरडून त्यास
म्हटलें, अहो स्वामीराज, साहाय्य करा ! २७ तो म्हणाला,
परमेश्वर तुला साहाय्य करीत नाहीं तर मी कोठून करूं ?
खळ्यांतून कीं द्राक्षाकुंडांतून ? २८ राजानें तिला विचा-
रिलें, तुला काय झालें ? तिनें उत्तर केलें, ही स्त्री मला
म्हणाली, तुझा मुलगा दे, म्हणजे आपण आज त्याला
खाऊं आणि उद्यां माझ्या मुलास खाऊं, २९ माझा पुत्र
शिजवून आम्हीं खाल्ला; पण दुसऱ्या दिवशीं मीं हिला
म्हटलें, तुझा पुत्र दे म्हणजे आपण त्यास खाऊं; तेव्हां
हिनें आपला पुत्र लपवून ठेविला. ३० त्या स्त्रीचें हें
भाषण ऐकून राजानें आपलीं वस्त्रें फाडिलीं. त्या
प्रसंगीं तो नगराच्या तटावर फिरत होता आणि लोकांनीं
पाहिलें तों त्यानें आंतून आपल्या अंगाला गोणताट
गुंडाळिलें आहे असें त्यांस दिसलें. ३१ तेव्हां तो
म्हणाला, शाफाटाचा पुत्र अलीशा याचें शीर जर मी
आज त्याच्या धडावर राहूं देईन तर देव माझें असेंच
किंबहुना याहूनहि अधिक करो. ३२ अलीशा त्या वेळीं
आपल्या घरांत बसला असून त्याच्याभोवतीं वडील जन
बसले होते; राजानें आपल्याजवळचा एक जासूद पाठ-
विला; तो जाऊन पोहंचण्यापूर्वी अलीशा त्या वडील जनांस
म्हणाला, पाहा, या खुनी मनुष्याच्या पुत्रानें माझें शीर
छेदण्यास मनुष्य पाठविला आहे; तर तो जासूद आला
म्हणजे कवाडें लावून घेऊन त्यास लोटून द्या; त्याच्या
मागोमाग त्याच्या धन्याच्या पावलांची चाहूल ऐकूं येत
आहे, नाहीं काय ? ३३ तो त्यांच्याशीं असें बोलत
आहे इतक्यांत जासूद त्यांच्यापाशीं येऊन पोहंचला.
तो म्हणाला, ही विपत्ति परमेश्वरानें पाठविली आहे तर
यापुढें मीं परमेश्वराची वाट कां पाहावी ?

७ १ तेव्हां अलीशा म्हणाला, तुम्ही परमेश्वराचें
वचन ऐका: परमेश्वर म्हणतो, उद्यां याच वेळीं
शोमरोनाच्या वेशींत एक माप सपीठ एका शेकेलास
व दोन मापें सातू एका शेकेलास मिळतील. २ राजाच्या
हाताजवळ सरदार होता तो देवाच्या माणसास म्हणाला,
पाहा, परमेश्वरानें आकाशकपाटें उघडलीं तरी असा प्रकार
होईल काय ? त्यानें त्यास म्हटलें, तूं आपल्या डोळ्यांनीं
हें पहाशील पण त्यांतलें कांहीं खावयाचा नाहींस.

३ त्या वेळीं वेशीच्या बाहेर चार कोडी माणसें होतीं तीं
एकमेकांस म्हणालीं, येथें बसून कां मरावें? ४ नगरांत
जाऊं म्हटलें तर तेथेंहि आपण मरणारच, कारण तेथें
महागाई आहे; आणि येथें बसून राहिलों तरीहि मर-
णारच; तर चला, आपण अरामी सेनेस जाऊन मिळूं;
त्यांनीं आपल्याला जिवंत ठेविलें तर आपण जगूं; त्यांनीं
आपल्याला मारून टाकिलें तर आपण मरूं एवढेंच.
५ ते संध्याकाळच्या वेळीं अरामी लोकांच्या छावणीकडे
जावयास निघाले; अरामी लोकांच्या छावणीच्या
बाहेरल्या हद्दीवर ते येऊन पाहतात तों तेथें एक
माणूसहि नव्हता. ६ कारण परमेश्वरानें रथ, घोडे व
प्रचंड सैन्य यांचा गलबला अरामी सेनेच्या कानीं पाडला;
तेव्हां ते आपसांत म्हणाले, पाहा, इस्राएलाच्या राजानें
हित्ती व मिसरी राजे द्रव्य देऊं करून बोलाविले आहेत;
७ म्हणून त्यांनीं संध्याकाळीं उठून पलायन केलें; आपले
डेरे, घोडे व गाढवें जागच्या जागीं टाकून व छावणी
सोडून ते आपला जीव घेऊन पळाले. ८ छावणीच्या
बाहेरल्या हद्दीशीं आल्यावर त्या कोड्यांनीं एका तंबूंत
जाऊन तेथें खाणेंपिणें केलें आणि त्यांतून रुपें, सोनें
व वस्त्रें नेऊन लपवून ठेविलीं; मग परत येऊन ते दुसऱ्या
डेऱ्यांत गेले, आणि त्यांतूनहि माल नेऊन त्यांनीं
छपवून ठेविला. ९ मग ते आपसांत म्हणूं लागले,
आपण करीत आहों तें बरें नाहीं; आज शुभवार्ता
कळविण्याचा दिवस आहे, पण आपण गप्प बसलों
आहों. सकाळ होईपर्यंत आपण थांबलों तर आपल्याला
शासन होईल; तर चला, आपण राजवाड्यांत जाऊन
हें कळवूं. १० त्यांनीं जाऊन नगराच्या वेसकऱ्यांस
हाक मारून सांगितलें, आम्ही अरामी लोकांच्या
छावणीकडे गेलों होतों, तों पाहा, तेथें एकहि मनुष्य
नाहीं; मनुष्यांचा शब्दहि नाहीं; तेथें घोडे व गाढवें
हीं बांधून ठेविलेलीं आहेत, डेरेहि जशाचे तसेच आहेत.
११ तेव्हां वेसकऱ्यांनीं पुकारून राजमंदिरांत ही
खबर पोंचविली. १२ राजा रात्रीचा उठून आपल्या
सेवकांस म्हणाला, अरामी लोकांचा काय विचार आहे
हें मी तुम्हांस सांगतों. त्यांस ठाऊक आहे कीं आपली
उपासमार झाली आहे; हें जाणून ते छावणीच्या बाहेर
मैदानांत लपून राहिले आहेत; त्यांचा मनसोबा असा
कीं आपण नगरांतून बाहेर पडलों कीं आपल्याला
जीवंत पकडून नगरांत प्रवेश करावा. १३ राजाच्या
एका सेवकानें म्हटलें, नगरांत वांचून राहिलेल्या
घोड्यांतले पांच घोडे देऊन काय आहे तें पाहावयास
कोणास तरी पाठवावें; इस्राएलांचा जो समुदाय बाकी
राहिला आहे त्याच्यासारखी त्या मनुष्यांची गति
होईल; अगर ज्या इस्राएलांचा संहार झाला आहे
त्यांच्यासारखी त्यांची स्थिति होईल. १४ मग दोन
रथ व घोडे जुंपून आणिले आणि राजानें अरामी सैन्या-
मागें कांहीं लोक पाठविले; त्यानें त्यांस सांगितलें,
काय आहे तें पाहून या. १५ ते यार्देनेपर्यंत त्यांच्या
मागून गेले आणि पाहतात तों अरामी लोकांनीं
आपलीं वस्त्रेंपात्रें गडबडींत रस्ताभर टाकून दिलेलीं
त्यांस आढळलीं. जासूदांनीं परत जाऊन राजास हें
सांगितलें. १६ तेव्हां लोकांनीं बाहेर पडून अरामी
लोकांचे डेरे लुटिले. याप्रमाणें परमेश्वराच्या वचनानुसार
एका शेकेलास मापभर सपीठ व एका शेकेलास दोन मापें
सातू विकूं लागले. १७ राजाच्या हाताजवळ जो सरदार
होता त्यास वेशीवर नेमलें होतें. वेशींत लोकांची गर्दी झाली
तींत त्यांच्या पायांखालीं सांपडून तो मेला; राजा
देवाच्या माणसाकडे आला होता तेव्हां त्यानें त्यांस जें
सांगितलें होतें त्याप्रमाणें झालें. १८ देवाचा माणूस
राजास म्हणाला होता कीं उद्यां याच वेळेस शोमरोनाच्या
वेशींत एका शेकेलास दोन मापें सातू व एका
शेकेलास एक माप सपीठ मिळेल, तसेंच झालें; १९ त्या
सरदारानें देवाच्या माणसास म्हटलें होतें कीं परमे-
श्वरानें आकाशकपाटें उघडिलीं तरी असा प्रकार होईल
काय? त्यास त्यानें प्रत्युत्तर दिलें होतें कीं तूं आपल्या
डोळ्यांनीं हें पाहशील पण त्यांतलें कांहीं खावयाचा
नाहींस. २० त्याप्रमाणेंच त्याचें झालें; वेशींत लोकांची
गर्दी झाली होती त्यांच्या पायांखालीं सांपडून तो मेला.

१ ज्या स्त्रीच्या मुलास अलीशानें जीवंत केलें
८ होतें तिला त्यानें सांगितलें, तूं आपल्या घरची
मंडळी घेऊन सोइस्कर होईल त्या देशांत जाऊन
राहा, कारण परमेश्वर दुष्काळ पाठविणार आहे व तो या
देशांत सात वर्षें चालू राहावयाचा आहे. २ देवाच्या
माणसाच्या या सांगण्याप्रमाणें ती स्त्री आपल्या घरची
मंडळी घेऊन पलिष्ट्यांच्या देशीं जाऊन सात वर्षें राहिली.
३ सात वर्षें लोटल्यावर ती स्त्री पलिष्ट्यांच्या देशाहून
परत आली आणि आपलें घर व जमीन यांच्यासंबंधानें
फिर्याद घेऊन राजाकडे गेली. ४ त्या प्रसंगीं राजा
देवाच्या माणसाचा चाकर गेहजी याजशीं बोलत
होता आणि अलीशानें जीं मोठीमोठीं कृत्यें केलीं त्यांचें
वर्णन कर असें तो त्यास सांगत होता. ५ अलीशानें
एका मृतास जीवंत केल्याचें तो राजास सांगत होता
तोंच जिचा मुलगा त्यानें जीवंत केला होता तीच
स्त्री तथें आली आणि आपलें घर व जमीन यांच्या-
संबंधानें तिनें राजापाशीं फिर्याद केली. गेहजी म्हणाला,
स्वामीमहाराज, हीच ती स्त्री आणि अलीशानें जीवंत
केलेला हाच तो मुलगा. ६ तेव्हां तुला काय पाहिजे असें
राजानें विचारिल्यावर तिनें आपली हकीकत त्यास
सांगितली. राजानें एका अमलदारास तिजबरोबर
पाठविलें; त्यास त्यानें सांगितलें, तिचें जें कांहीं आहे
तें सर्व आणि तिनें देश सोडिला तेव्हांपासून आज-
पर्यंतचें तिच्या शेताचें उत्पन्न तिला मिळवून देण्याची
तजवीज कर.

७ मग अलीशा दिमिष्कास गेला; त्या समयीं
अरामाचा राजा बेन-हदाद दुखण्यास पडला होता; तेव्हां
देवाचा माणूस आला आहे असें कोणीं जाऊन त्यास
सांगितलें. ८ तेव्हां राजानें हजाएलास सांगितलें, हातीं
नजराणा घेऊन देवाच्या माणसाच्या भेटीस जा आणि
त्याच्याद्वारें परमेश्वरास प्रश्न कर कीं मी या रोगांतून
बरा होईन काय? ९ तेव्हां हजाएल दिमिष्कांतील
सर्व उत्तम उत्तम वस्तु चाळीस उंटांवर लादून त्याच्या
भेटीस गेला व त्याच्यासमोर उभा राहून म्हणाला,
तुझा पुत्र अरामाचा राजा बेन-हदाद यानें तुला असें
विचारावयास मला पाठविलें आहे कीं मी या रोगांतून
पार पडेन कीं नाहीं? १० अलीशा त्यास म्हणाला, तूं
जाऊन त्यास सांग, तूं खात्रीनें बरा होशील; तथापि
परमेश्वरानें मला कळविलें आहे कीं तो अवश्य मरणार.
११ तो त्याजकडे एकसारखी टक लावून पाहूं लागला;
त्यानें इतकी टक लाविली कीं तो भांबावून गेला; आणि
देवाचा माणूस रडूं लागला. १२ हजाएलानें विचारिलें,
माझे स्वामी कां रडत आहेत? त्यानें म्हटलें, तूं इस्रा-
एल लोकांस उपद्रव देणार; त्यांची तटबंदी नगरें तूं
जाळून टाकणार, त्यांचे तरुण पुरुष तरवारीनें
वधणार; त्यांचीं मुलेंबाळें तूं आपटून मारणार; त्यांच्या
गर्भवती स्त्रिया तूं चिरून टाकणार; हें सर्व मला
ठाऊक आहे म्हणून. १३ हजाएल म्हणाला, आपला
दास तर केवळ कुत्रा आहे; तो असलीं भारी कृत्यें कशीं
करणार? अलीशा म्हणाला, तूं अरामाचा राजा होणार
हें परमेश्वरानें मला कळविलें आहे. १४ तो अलीशा-
पासून निघून आपल्या धन्याकडे गेला; त्यानें त्यास
विचारिलें, अलीशा तुला काय म्हणाला, त्यानें उत्तर
केलें कीं आपण खात्रीनें बरें व्हाल असें त्यानें सांगितलें.
१५ दुसऱ्या दिवशीं त्यानें एक रजई घेऊन व ती
पाण्यांत भिजवून त्याच्या तोंडावर पसरली; तेव्हां त्यामुळें
तो मरण पावला; त्याच्या जागीं हजाएल राजा झाला.

१६ इस्राएलाचा राजा अहाब याचा पुत्र योराम
याच्या कारकीर्दीच्या पांचव्या वर्षी यहोशाफाट
यहूदाचा राजा होता त्या वेळीं त्याचा पुत्र यहोराम हा
राज्य करूं लागला. १७ तो बत्तीस वर्षांचा असतां
राज्य करूं लागला; त्यानें यरुशलेमांत आठ वर्षें राज्य केलें.
१८ अहाबाच्या घराण्याप्रमाणें, इस्राएलाच्या राजांच्या
रीतीप्रमाणें तो चालला; त्यानें अहाबाच्या कन्येशीं
लग्न केलें; परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें केलें.
१९ तथापि आपला सेवक दावीद याच्यास्तव यहूदाचा
नाश करावासें परमेश्वराला वाटलें नाहीं, कारण त्यानें
त्यास वचन दिलें होतें कीं तुझ्या संतानाच्या ठायीं

१ पाठभेद: बरा होणार नाहींस हें खास; कारण
परमेश्वरानें

मी तुझा दीप कायम ठेवीन. २० त्याच्या कारकीर्दीत
अदोमानें यहूदाचें स्वामित्व झुगारून देऊन आपला
एक राजा नेमिला. २१ तेव्हां योराम आपले सर्व रथ
बरोबर घेऊन साईर येथें गेला; ज्या अदोमी लोकांनीं
त्यास घेरिलें होतें त्यांस व रथाच्या नायकांस त्यानें
रात्रीच्या वेळीं उठून मार दिला; तेव्हां लोक आप-
आपल्या डेऱ्यांकडे पळून गेले. २२ अदोमानें यहूदाचें
स्वामित्व झुगारून दिलें; तें आजवर तसेंच आहे. याच
सुमारास लिब्नानें यहूदाचें स्वामित्व झुगारून दिलें.
२३ योरामानें केलेल्या बाकीच्या गोष्टी व त्यानें केलेलीं
सगळीं कामें या सर्वांचें वर्णन यहूदाच्या राजांच्या
बखरींत केलें आहे, नाहीं काय? २४ नंतर योराम
आपल्या पितरांजवळ जाऊन निजला; त्यास दावीद-
पुरांत त्याच्या पूर्वजांमध्यें मूठमाती दिली; त्याचा पुत्र
अहज्या हा त्याच्या जागीं राजा झाला.

२५ अहाबाचा पुत्र इस्राएलाचा राजा योराम याच्या
कारकीर्दीच्या बाराव्या वर्षी यहूदाचा राजा यहोराम
याचा पुत्र अहज्या हा राज्य करूं लागला. २६ अहज्या
राज्य करूं लागला तेव्हां तो बावीस वर्षांचा होता;
त्यानें यरुशलेमांत एक वर्ष राज्य केलें. त्याच्या आईचें
नांव अथल्या; ही इस्राएलाचा राजा अम्री याची नात.
२७ त्याची चालचलणूक अहाबाच्या घराण्यासारखी
होती, आणि अहाबाच्या घराण्याप्रमाणेंच परमेश्वराच्या
दृष्टीनें जें वाईट तें त्यानें केलें, कारण अहाबाच्या
घराण्याचा तो जामात होता. २८ तो अहाबाचा पुत्र
योराम याच्याबरोबर रामोथ-गिलाद येथें अरामाचा राजा
हजाएल याशीं लढावयास गेला; तेव्हां अरामी लोकांनीं
योरामास घायाळ केलें. २९ योराम राजा हजाएलाशीं
रामा येथें लढतांना अरामी लोकांच्या हातून जे
घाय त्यास झाले होते ते बरे व्हावे म्हणून तो इज्रेल
येथें गेला. अहाबाचा पुत्र योराम हा इज्रेल येथें
आजारी होऊन पडला होता म्हणून यहूदाचा राजा
यहोराम याचा पुत्र अहज्या त्याच्या समाचारास गेला.

१ नंतर अलीशा संदेष्ट्यानें संदेष्ट्यांच्या शिष्यां-
९ पैकीं एकास बोलावून सांगितलें, कमर बांध आणि
हीं तेलाची कुपी हातीं घेऊन रामोथ-गिलाद येथें
जा. २ तेथें पोहंचल्यावर येहू बिन यहोशाफाट बिन
निम्शी यास शोधून काढ; मग आंत जाऊन त्याला
त्याच्या भाऊबंदांतून उठवून आंतल्या खोलींत घेऊन जा.
३ मग ही तेलाची कुपी घेऊन त्याच्या मस्तकावर ओत
व असें बोल: परमेश्वर म्हणतो, तूं इस्राएलाचा राजा
व्हावें म्हणून मीं तुला अभिषेक केला आहे; मग दार
उघडून पळ काढ, थांबूं नको. ४ नंतर तो तरुण संदेष्टा
रामोथ-गिलाद येथें गेला. ५ तो तेथें जाऊन पोहंचतो
तों तेथें सैन्याचे सरदार बसले आहेत असें त्याला
दिसून आलें; तेव्हां तो म्हणाला, हे सरदारा, तुला
कांहीं सांगावयाचें आहे. येहूनें विचारिलें, आम्हां सगळ्यां-
तून कोणाला? तो म्हणाला, हे सरदारा, तुला.
६ तेव्हां तो उठून घरांत गेल्यावर त्या शिष्यानें
त्याच्या मस्तकावर तेल ओतून म्हटलें, इस्राएलाचा देव
परमेश्वर म्हणतो, मीं तुला परमेश्वराच्या लोकांचा
म्हणजे इस्राएलांचा राजा व्हावें म्हणून अभिषेक केला
आहे; ७ ईजबेलीच्या हातून माझे सेवक जे संदेष्टे
आणि परमेश्वराचे दुसरे सर्व सेवक यांचा रक्तपात
झाला आहे त्याचा मला सूड घेणें आहे, म्हणून
आपला धनी अहाब याच्या घराण्याचा तूं संहार कर.
८ अहाबाच्या सर्व घराण्याचा समूळ नाश होईल;
अहाबाचा प्रत्येक मुलगा, मग तो इस्राएलाच्या अटकेंत
असो कीं मोकळा असो, त्याचा मी उच्छेद करीन;
९ नबाटाचा पुत्र यराबाम व अहीयाचा पुत्र
बाशा यांच्या घराण्यांसारखें मी अहाबाच्या घराण्याचें
करीन; १० इज्रेलाच्या भूमीवर ईजबेलीस कुत्रीं
खातील; तिला पुरावयास कोणी असणार नाहीं.
मग दार उघडून त्यानें पळ काढिला. ११ येहू बाहेर
आपल्या धन्याच्या सेवकांकडे आला तेव्हां एकानें
त्यास विचारिलें, सर्व कांहीं ठीक आहे ना? तो वेडा
तुझ्याकडे कां आला होता? तो त्यांस म्हणाला, तो
मनुष्य कोण व त्याचा संदेश काय हें तुम्हांस माहीत
आहेच. १२ ते म्हणाले, भलतेंच; काय आहे तें
आम्हांस सांग. तो म्हणाला, त्यानें मला असें असें
सांगितलें. परमेश्वर म्हणतो, तूं इस्राएलाचा राजा
व्हावें म्हणून मीं तुला अभिषेक केला आहे.

१३ हें ऐकून त्यांनीं त्वरा करून आपआपलीं
वस्त्रें उतरून त्याच्या पायाखालीं पायऱ्यांवर
पसरिलीं आणि करणा वाजवून येहू राजा झाला
असा पुकारा केला. १४ या प्रकारें येहू बिन यहो-
शाफाट बिन निमूशी यानें योरामाविरुद्ध फितुरी केली.
(त्या समयीं योराम सर्व इस्राएलासह अरामाचा राजा
हजाएल याच्या भीतीमुळें रामोथ-गिलादाचें रक्षण
करीत होता; १५ पण अरामाचा राजा हजाएल याशीं
लढतांना योराम राजास अराम्यांच्या हातून जे घाव
लागले होते ते सर्व बरे व्हावे म्हणून तो इज्रेलास परत
गेला होता.) येहू म्हणाला, तुमच्या मनास येईल
तर या नगरांतून कोणालाहि इज्रेलास हें कळविण्यासाठीं
निसटून जाऊं देऊं नका. १६ येहू रथांत बसून इज्रेलास
गेला; तेथें योराम पडून होता आणि यहूदाचा राजा
अहज्या हा त्याच्या भेटीस आला होता. १७ इज्रेल
येथील बुरुजावर पहारेकरी उभा होता. त्यानें येहू येत
होता त्याची टोळी पाहिली; तेव्हां त्यानें कळविलें कीं
मला एक टोळी दिसत आहे. तेव्हां योराम म्हणाला,
एक स्वार पाठून त्याजकडे पाठीव, त्याला सांग कीं सर्व
कांहीं ठीक आहे ना, असें त्याला विचार. १८ तेव्हां
त्याला भेटावयास एक जण घोड्यावर बसून गेला व
त्याला म्हणाला, राजा असें विचारतो कीं सर्व कांहीं
ठीक आहे काय? येहू म्हणाला, ठीक आहे किंवा
नाहीं याची तुला काय पंचाईत? चल; माझ्यामागें
हो. तेव्हां पहारेकऱ्यानें सांगितलें कीं जासूद त्यांजकडे
गेला आहे पण तो कांहीं परत आला नाहीं. १९ मग त्यानें
दुसरा स्वार पाठविला; तो त्याजपाशीं जाऊन म्हणाला,
राजा विचारितो कीं सर्व कांहीं ठीक आहे काय? येहूनें
त्यास म्हटलें, ठीक आहे किंवा नाहीं याची तुला काय
पंचाईत? चल, माझ्यामागें हो. २० तेव्हां पहारे-
कऱ्यानें सांगितलें: तोहि त्यांच्याकडे गेला आहे पण परत
आला नाहीं. त्याचें रथ हांकणें निमूशीचा पुत्र येहू
याच्या रथ हाकण्यासारखें आहे; तो मोठ्या सपाट्यानें
रथ हाकीत आहे. २१ योराम म्हणाला, रथ तयार
करा; तेव्हां त्यांनीं त्याचा रथ तयार केला. इस्रा-
एलाचा राजा योराम आणि यहूदाचा राजा अहज्या हे
आपआपल्या रथांत बसून येहूला भेटावयास गेले;
इज्रेलकर नाबोथ याच्या शेतांत त्यांची गांठ पडली.
२२ योरामानें येहूस पाहिलें तेव्हां तो म्हणाला, येहू,
सर्व कांहीं ठीक आहे ना? येहू म्हणाला, तुझी
आई ईजबेल हिचे व्यभिचार व गारुडें यांचा सपाटा
जोंपर्यंत चालला आहे तोंपर्यंत ठीक कसें असणार?
२३ हें ऐकून योरामानें आपला रथ फिरवून पळ
काढिला व अहज्यास म्हटलें, अहज्या, दगा रे दगा!
२४ येहूनें आकर्ण धनुष्य ओढून योरामाच्या बाहूंच्या
दरम्यान असा बाण मारिला कीं तो त्याचा ऊर फोडून
गेला आणि तो रथांत कलंडून पडला. २५ तेव्हां येहूनें
आपला सरदार बिदकर यास सांगितलें, त्यास उचलून
इज्रेली नाबोथाच्या शेतांत फेकून दे; त्याचा बाप
अहाब याच्या मागून तूं आणि मी रथांतून चाललों
असतां परमेश्वरानें त्याला शासन सांगितलें होतें तें
आठीव; २६ परमेश्वर म्हणाला, काल नाबोथाचा व
त्याच्या पुत्रांचा खून झाला तो मीं पाहिलाच आहे;
परमेश्वराचें हें म्हणणें आहे कीं याच शेतांत मी तुला
याचा बदला देईन. यास्तव परमेश्वराच्या वचनानुसार
याला उचलून त्या शेतांत टाक. २७ हें पाहून
यहूदाचा राजा अहज्या हा बागेंतील भवनाच्या रस्त्यानें
पळून गेला. येहूनें त्याचा पाठलाग करून म्हटलें, त्यालाहि
रथांतच ठार करा. त्यांनीं त्यास इब्लामाजवळील
गुरघाटांत मार दिला. तो तसाच मगिद्दोपर्यंत पळून
जाऊन तेथें मेला. २८ तेव्हां त्याच्या चाकरांनीं त्यास
रथांत घालून यरुशलेमास नेलें आणि दावीदपुरांत
त्याच्या वडिलांच्या थडग्यांत त्यास मूठमाती दिली.

२९ अहाबाचा पुत्र योराम याच्या कारकीर्दीच्या
अकराव्या वर्षी अहज्या यहूदावर राज्य करूं
लागला होता.

३० येहू इज्रेलास आल्याचें ईजबेलीनें ऐकलें
तेव्हां ती डोळ्यांत सुरमा घालून व मस्तक शृंगारून
खिडकींतून बाहेर पाहत बसली. ३१ येहू फाटकाजवळ

१ मुळांत: १५, १७, व २१–२४ यांत यहोराम.

आला तेव्हां ती म्हणाली, आपल्या धन्याचा खून
करणाऱ्या जिम्री, सर्व कांहीं ठीक आहे काय? ३२ येहूनें
वर खिडकीकडे तोंड करून म्हटलें, माझ्या पक्षाचा
कोणी आहे काय? तेव्हां दोघां खोज्यांनीं त्याजकडे
खिडकींतून डोकावलें. ३३ त्यानें त्यांना सांगितलें,
तिला खालीं टाका. त्यांनीं तिला खालीं टाकिलें,
तेव्हां तिचें कांहीं रक्त भिंतीवर व घोड्यांवर पडलें
आणि त्यानें तिला पायांखालीं तुडविलें. ३४ मग तो
आंत जाऊन खाऊनपिऊन म्हणाला, जा; ती शापित
स्त्री कोठें आहे तें पाहा व तिला मूठमाती द्या, कारण ती
राजकन्या आहे. ३५ तिला मूठमाती देण्यासाठीं ते
गेले तेव्हां तिची करोटी, पाय व हाताचे तळवे
यांखेरीज तिचें त्यांस कांहीं सांपडलें नाहीं. ३६ त्यांनीं
परत येऊन त्यास हें कळविलें. तेव्हां तो म्हणाला,
परमेश्वरानें आपला सेवक एलीया तिश्बी याच्या द्वारें जें
वचन सांगितलें होतें त्याप्रमाणें हें घडलें. त्यानें म्हटलें
होतें: इज्रेलाच्या शेतांत कुत्रीं ईजबेलीचें मांस खातील.
३७ ईजबेलीचें मढें इज्रेलांतील शेतांत खताप्रमाणें
पडून राहील; ही ईजबेल आहे असें कोणी
ओळखणार नाहीं.

१ अहाबाचे सत्तर पुत्रपौत्र शोमरोनांत
१० राहत असत. येहूनें इज्रेल येथील वडील जनां-
पैकीं जे अधिकारी होते त्यांस आणि अहाबाच्या
पुत्रांची निगा करणें ज्यांकडे होतें त्यांस पत्रें लिहून
शोमरोनास पाठविलीं; त्यांत असें म्हटलें होतें:
२ तुमच्या धन्याचे पुत्रपौत्र तुम्हांमध्यें राहत आहेत;
तुमच्या स्वाधीन रथ, घोडे, तटबंदी नगर व हत्यारेंहि
आहेत; तर हें पत्र तुम्हांस पोहंचतांच ३ तुमच्या
धन्याच्या पुत्रांपैकीं जो उत्तम व योग्य असेल त्यास
निवडून त्याच्या बापाच्या गादीवर बसवा आणि तुमच्या
धन्याच्या कुळासाठीं युद्ध करा. ४ यावरून ते अति-
शयित घाबरले; ते म्हणाले, ह्याच्यासमोर दोन राजांचा
टिकाव लागला नाहीं, तर आमचा कसा लागेल?
५ मग राजाचा खानगी कारभारी, नगरचा अधिकारी,
तेथील वडील जन आणि त्या मुलांची निगा करणारे या
सर्वांनीं येहूला सांगून पाठविलें कीं आम्ही आपले दास
आहों; आपण आम्हांस सांगाल तें आम्ही करूं; आम्ही
कोणासहि राजा करणार नाहीं; आपल्या नजरेस बरें
दिसेल तें करा. ६ मग त्यानें त्यांस दुसऱ्यांदा पत्र
लिहून पाठविलें, तें असें: तुम्ही माझ्या पक्षाचे
असल्यास व माझें म्हणणें मानीत असल्यास आपल्या
धन्याच्या पुत्रपौत्रांचीं शिरें छेदून उद्यां ह्या वेळेपर्यंत
मजकडे इज्रेल येथें हजर व्हा. राजपुत्र सत्तर होते,
त्यांची निगा करणाऱ्या नगरांतल्या थोर लोकांजवळ
ते राहत असत. ७ तें पत्र त्यास जाऊन पोहंचतांच
त्यांनीं त्या सत्तर राजपुत्रांस पकडून त्यांचा वध केला
आणि त्यांचीं शिरें टोपल्यांत घालून त्याजकडे इज्रेल
येथें पाठवून दिलीं. ८ एका जासुदानें त्यास जाऊन
सांगितलें, राजपुत्रांचीं शिरें हजर आहेत. त्यानें त्यास
सांगितलें, वेशीपाशीं त्यांच्या दोन राशी करून
सकाळपर्यंत ठेवा. ९ सकाळीं तो बाहेर जाऊन उभा
राहिला व सर्व लोकांस म्हणाला, तुम्ही न्यायी आहां;
मीं आपल्या स्वामीचा द्रोह करून त्याचा घात केला, पण
या सर्वांचा वध कोणीं केला? १० हें पक्कें समजा कीं
अहाबाच्या घराण्याविषयीं परमेश्वर जें म्हणाला आहे
त्यांतला एकहि शब्द व्यर्थ व्हावयाचा नाहीं. परमेश्वरानें
आपला सेवक एलीया याच्या द्वारें जें सांगितलें तें त्यानें
केलें आहे. ११ इज्रेल येथें अहाबाच्या घराण्यांतील
जे लोक उरले होते ते सर्व, त्याचे सर्व थोर पुरुष, जिव-
लग मित्र व याजक हे येहूनें वधिले, त्यांतला एकहि शेष
राहूं दिला नाहीं. १२ मग तो उठून शोमरोनास जावयास
निघाला. मार्गांत येहू मेंढपाळांच्या लोकर कातरण्याच्या
वाड्यानजीक आला असतां, १३ यहूदाचा राजा अहज्या
याचे भाऊ त्यास भेटले; तेव्हां त्यानें विचारिलें, तुम्ही
कोण? त्यांनीं सांगितलें, आम्ही अहज्याचे भाऊबंद आहों.
आम्ही राजपुत्रांच्या व राजमातेच्या पुत्रांच्या समाचारास
चाललों आहों. १४ तेव्हां त्यानें सांगितलें, यांस जीवंत
पकडा. त्यांनीं त्यांस जीवंत पकडिलें; त्या चाळीस पुरुषांस
त्या मेंढरें कातरण्याच्या जागेजवळील हौदानजीक जिवें
मारण्यांत आलें: त्यानें त्यांतला एकहि जीवंत ठेविला नाहीं.

१५ तो तेथून निघाल्यावर रेखाबाचा पुत्र यहो-
नादाब त्याच्या भेटीस येतांना त्यास आढळला; त्यानें
त्याचें क्षेमकुशल विचारिल्यावर त्यास म्हटलें, तुझ्या-
विषयीं माझें मन जसें शुद्ध आहे तसें तुझें आहे काय?
यहोनादाब म्हणाला, आहे. मग तो म्हणाला, असें
असेल तर मला तुझा हात दे. त्यानें त्यास हात दिला
आणि आपल्या रथावर घेतलें. १६ तो त्यास म्हणाला,
मजबरोबर चल; परमेश्वराप्रीत्यर्थ मला किती उत्कट
आस्था आहे ती पाहा. या प्रकारें त्यानें त्याला रथांत बस-
वून घेतलें. १७ परमेश्वरानें एलीयास सांगितलें होतें त्या
वचनानुसार येहूनें शोमरोनास येऊन अहाबाचे जितके
लोक तेथें शेष राहिले होते त्या सर्वांचा वध करून
अहाबास नामशेष केलें. १८ नंतर येहूनें सर्व लोकांस
जमा करून सांगितलें, अहाबानें बालमूर्तींची सेवा
थोडी केली; येहू सेवा फार करणार. १९ तर आतां
बालमूर्तींचे सर्व संदेष्टे, सर्व उपासक आणि सर्व याजक
यांस मजकडे बोलावून आणा, त्यांतला कोणीहि मागें
राहूं देऊं नका; बालाप्रीत्यर्थ मला महायज्ञ करावयाचा
आहे. जो कोणी मागें राहील त्यास देहांतशिक्षा
होईल. बालमूर्तींच्या सर्व उपासकांचा संहार करावा
म्हणून येहूनें ही कपटयुक्ति योजिली. २० येहू म्हणाला,
बालाप्रीत्यर्थ एक पवित्र महासभा भरवा; तेव्हां लोकांनीं
दौंडी पिटिली. २१ येहूनें सर्व इस्राएलांत जासूद
पाठविले; तेव्हां बालमूर्तींचे सर्व उपासक आले, त्यांतला
एकहि आल्यावांचून राहिला नाहीं. ते सर्व बालाच्या
देवळांत जमा झाले; तेव्हां बालाचें देऊळ येथूनतेथून
सगळें गच्च भरलें. २२ वस्त्रभांडाराचा कारभारी होता
त्यास त्यानें सांगितलें, बालाच्या उपासकांसाठीं वस्त्रें
भांडारांतून काढ. तेव्हां त्यानें त्यांच्यासाठीं वस्त्रें
काढून आणिलीं. २३ नंतर येहू आणि रेखाबाचा पुत्र यहो-
नादाब हे बालाच्या देवळांत गेले; येहू बालाच्या
उपासकांस म्हणाला, येथें तुम्हांबरोबर परमेश्वराचे कोणी
उपासक आहेत किंवा सर्व केवळ बालाचे उपासक
आहेत हें तपासून पाहा. २४ मग ते यज्ञ करण्यास व
होमबलि अर्पिण्यास आंत गेले. इकडे येहूनें ऐशीं पुरुष
बाहेर ठेविले होते त्यांस त्यानें सांगितलें कीं जीं माणसें
मी तुमच्या हवालीं करीन त्यांतला कोणी निसटून गेला
तर जो त्यास जाऊं देईल त्याचा प्राण त्याच्याऐवजीं
घेण्यांत येईल. २५ होमबलि अर्पिण्याचें संपलें तेव्हां
येहूनें पहारेकऱ्यांस व सरदारांस सांगितलें, कीं आंत
जाऊन त्यांचा वध करा; एकासहि बाहेर जाऊं देऊं
नका. तेव्हां त्यांनीं तरवारीच्या धारेखालीं त्यांचा संहार
केला; त्या पहारेकऱ्यांनीं व सरदारांनीं त्यांस बाहेर
फेकून दिलें आणि बालाच्या देवळाच्या गढींत ते गेले.
२६ बालाच्या देवळांत जे स्तंभ होते ते त्यांनीं बाहेर
काढून जाळून टाकिले. २७ त्यांनीं बालाच्या मूर्ति-
स्तंभाचा भंग केला, आणि त्याचें देऊळ मोडून त्याचा
पायखाना केला; तो आजवर आहे. २८ या प्रकारें
येहूनें इस्राएल लोकांतून बालमूर्ति काढून टाकिली.
२९ तथापि नबाटपुत्र यराबाम यानें इस्राएल लोकांस
ज्या पापकर्मांच्या योगानें पाप करावयास लाविलें तीं
पापकर्में, अर्थात् बेथेल व दान येथें असलेलीं सोन्याचीं
वासरें यांचा नाद येहूनें सोडिला नाहीं. ३० परमेश्वर
येहूस म्हणाला, माझ्या दृष्टीनें जें बरें तें तूं
केलें आहे, माझ्या मनोदयाप्रमाणें तूं अहाबाच्या
घराण्याचें केलें आहे म्हणून तुझ्या चौथ्या पिढीपर्यंत
तुझे वंशज इस्राएलाच्या गादीवर बसतील; ३१ पण
येहूनें इस्राएलाचा देव परमेश्वर याच्या धर्मशास्त्राप्रमाणें
चालण्याची पूर्ण मनानें खबरदारी घेतली नाहीं.
यराबामानें इस्राएलाकडून ज्या कर्मांच्या योगानें पाप
करविलें त्यांचा नाद त्यानें सोडिला नाहीं.

३२ त्या काळीं परमेश्वर इस्राएलाची छाटाछाट करूं
लागला; हजाएलानें इस्राएलाच्या साऱ्या मुलखांत त्यांस
मार दिला; ३३ यार्देनेच्या पूर्व थडीकडील सर्व गिलाद
देश आणि गादी, रऊबेनी, व मनश्शे यांचा देश म्हणजे
आर्णोन खोऱ्याजवळील अरोएरापासून गिलाद व
बाशान येथपर्यंतचा सर्व प्रदेश त्यानें घेतला.
३४ येहूच्या बाकीच्या गोष्टी, त्यानें केलेलीं सर्व कृत्यें,
त्याचा सर्व पराक्रम या सर्वांचें वर्णन इस्राएलाच्या
राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय? ३५ येहू

आपल्या पितरांजवळ जाऊन निजला तेव्हां लोकांनीं
त्यास शोमरोन येथें मूठमाती दिली. त्याच्या जागीं त्याचा
पुत्र यहोआहाज हा गादीवर बसला. ३६ येहूनें
शोमरोनांत इस्राएलावर अठ्ठावीस वर्षें राज्य केलें.

११ १ अहज्याची आई अथल्या हिनें आपला
पुत्र मेला आहे असें पाहिलें तेव्हां तिनें उठून
सर्व राजवंशाचा संहार केला. २ तरी योराम
राजाची कन्या व अहज्याची बहीण यहोशेबा हिनें
अहज्याचा पुत्र योवाश यास त्या वधावयाच्या राजपुत्रां-
तून चोरून नेलें आणि त्यास व त्याच्या दाईस बिछाने
ठेवण्याच्या कोठडींत छपवून ठेविलें; अथल्येच्या दृष्टी-
आड त्यास केल्यामुळें त्याचा वध झाला नाहीं. ३ यावर
परमेश्वराच्या मंदिरांत त्याला सहा वर्षें तिच्याजवळ
लपवून ठेविलें होतें. इकडे अथल्येनें देशावर राज्य केलें.
४ सातव्या वर्षी यहोयादानें हुजरे आणि गारदी
यांच्यांतल्या शतपतींस बोलावूं पाठविलें; त्यांस परमे-
श्वराच्या मंदिरांत आणून त्यांच्याशीं करार केला आणि
त्यांच्याकडून आणभाक करवून त्यांस तो राजपुत्र
दाखविला. ५ त्यानें त्यांस सांगितलें, तुम्हांस कराव-
याचें तें हें: जे तुम्हीं शब्बाथ दिवशीं येत असतां
त्या तुम्हांतल्या एक तृतीयांश लोकांनीं राज-
मंदिरावर पहारा ठेवावा; ६ एक तृतीयांश लोकांनीं
सूर वेशीवर पहारा ठेवावा आणि बाकीच्या एक
तृतीयांश लोकांनीं पहारेवाल्यांच्या मागें वेशींत राहावें;
या प्रकारें तुम्हीं मंदिराचा बंदोबस्त ठेवून नाकेबंदी
करा. ७ शब्बाथ दिवशीं तुमच्या ज्या दोन तुकड्या
कामावरून जात असतात त्यांनीं राजाभोवतीं राहून
परमेश्वराच्या मंदिराचें रक्षण करावें. ८ तुम्हीं सर्वांनीं
हत्यारबंद होऊन राजाभोवतीं जमावें; कोणी पहाऱ्याच्या
आंत आला कीं त्यास मारून टाकावें; राजा आंत-
बाहेर जाईल तेव्हां तुम्हीं त्याजबरोबर असावें.
९ यहोयादा याजकानें केलेल्या हुकमाप्रमाणें त्या
शतपतींनीं केलें; शब्बाथ दिवशीं जे लोक कामावर
यावयाचे होते व जे कामावरून घरीं जावयाचे होते
ते सर्व घेऊन ते यहोयादा याजकाकडे आले.
१० तेव्हां दावीद राजाच्या बरच्या व ढाली परमेश्व-
राच्या मंदिरांत होत्या त्या याजकानें शतपतींस
दिल्या. ११ ते पहारेवाले हातीं हत्यारें घेऊन
मंदिराच्या दक्षिण कोपऱ्यापासून उत्तर कोपऱ्यापर्यंत
वेदीच्या व मंदिराच्या जवळ राजासभोवार उभे
राहिले. १२ मग त्यानें राजकुमारास बाहेर आणिलें,
त्याच्या शिरीं मुकुट ठेवून त्याच्या हातीं आज्ञापट
दिला; मग त्यांनीं त्यास अभिषेक करून राजा केलें
व टाळ्यांचा गजर करून म्हटलें, राजा चिरायु
होवो. १३ पहारेकऱ्यांचा व लोकांचा गलबला ऐकून
अथल्या परमेश्वराच्या मंदिरांत त्यांच्याकडे आली;
१४ ती पहाते तों वहिवाटीप्रमाणें राजा उच्चस्थानीं
उभा आहे; त्याच्यापाशीं सरदार व करणे वाजविणारे
उभे आहेत व सर्व लोक आनंद करून करणे वाजवीत
आहेत असें तिच्या दृष्टीस पडलें. तेव्हां अथल्या आपलीं
वस्त्रें फाडून फितुरी रे फितुरी! असें ओरडली.
१५ मग यहोयादा याजकानें सेनेवर असलेल्या
शतपतींस आज्ञा केली कीं तिला सेनेच्या रांगेंतून बाहेर
काढा, तिच्यामागून जो जाईल त्याचा वध करा;
परमेश्वराच्या मंदिरांत तिचा वध होऊं नये म्हणून
याजकानें असें सांगितलें. १६ तेव्हां त्यांनीं तिला
जाण्यासाठीं वाट केली व राजमंदिराकडे घोडे ज्या
वाटेनें येत असत त्या वाटेनें ती बाहेर गेली; मग
तेथें तिला जिवें मारिलें.

१७ यानंतर राजा व प्रजा यांनीं परमेश्वराचे लोक
व्हावें म्हणून यहोयादानें त्यांजकडून परमेश्वराशीं
करार करविला; तसाच त्यानें राजा व प्रजा यांच्या-
मध्येंहि करार करविला. १८ तेव्हां देशांतील सर्व
लोकांनीं बालदैवताच्या देवळांत जाऊन तें मोडून
टाकिलें व त्याच्या वेद्या व मूर्ति यांचा भुगाभुगा केला
आणि बालाचा याजक मत्तान याचा वेद्यांसमोर वध
केला. मग याजकानें परमेश्वराच्या मंदिराचे कामदार
नेमिले, १९ आणि शतपति, हुजरे, गारदी व देशांतले
सर्व लोक यांस बरोबर घेऊन राजास परमेश्वराच्या
मंदिरांतून उतरून खालीं नेलें आणि गारद्यांच्या वेशीच्या

द्वारानें त्याला राजमंदिरांत पोंचविलें; तेव्हां राजा
राजासनावर विराजमान झाला. २० अथल्येस राज-
मंदिरापाशीं तरवारीनें वधिलें, तेव्हां सर्व लोक
आनंदित झाले व नगर शांत झालें.

२१ यहोआश राज्य करूं लागला तेव्हां तो सात
वर्षांचा होता. १ येहूच्या कारकीर्दीच्या सातव्या
१२ वर्षीं यहोआश राज्य करूं लागला; त्यानें चाळीस
वर्षें यरुशलेमांत राज्य केलें; त्याच्या आईचें
नांव सिब्या; ही बैर-शेबा येथली. २ यहोआशाला
यहोयादा याजकाची सल्लामसलत मिळत होती तोंवर
परमेश्वराच्या दृष्टीनें जें नीट तें तो करीत होता.
३ तरी त्यानें उच्चस्थानें काढून टाकिलीं नव्हतीं; आणि
लोक अजून उच्चस्थानीं बलि अर्पीत व धूप जाळीत.
४ यहोआशानें याजकास सांगितलें कीं समर्पण
केलेला जेवढा पैसा परमेश्वराच्या मंदिरीं येतो, म्हणजे
गणती करितांना प्रत्येक माणसाकडून घेतलेला
पैसा, प्रत्येक मनुष्याचें नवसाच्या संबंधानें याजक
मोल ठरवील तो पैसा आणि लोक परमेश्वराच्या
मंदिरांत खुशीनें आणीत तो सर्व पैसा, ५ याजकांनीं
आपल्या ओळखीच्या लोकांपासून घ्यावा आणि
मंदिरांत जी काय मोडतोड झाली असेल तिची
दुरुस्ती करावी. ६ असें असूनहि यहोआश राजाच्या
कारकीर्दीच्या तेविसाव्या वर्षापर्यंत मंदिराच्या मोड-
तोडीची दुरुस्ती झाली नाहीं. ७ तेव्हां यहोआश
राजानें यहोयादा याजक व इतर याजक यांस बोलावून
विचारिलें कीं मंदिराची मोडतोड झाली आहे तिची
तुम्ही दुरुस्ती कां करीत नाहीं? यापुढें आपल्या
ओळखीच्या लोकांपासून पैसे घेऊन ठेवूं नका; तर ते
मंदिराच्या दुरुस्तीसाठीं देऊन टाका. ८ इतःपर
याजकांनीं लोकांपासून पैसे घ्यावयाचे नाहींत आणि
त्यांनीं मंदिराची दुरुस्तीहि करावयाची नाहीं, यास ते
मान्य झाले; ९ पण यहोयादा याजकानें एक पेटी
घेऊन तिच्या झांकणास एक भोक पाडिलें आणि
ती परमेश्वराच्या मंदिरांत येणाऱ्यांच्या उजव्या
हाताकडे वेदीजवळ ठेविली, परमेश्वराच्या मंदिरांत
जेवढा पैसा येत असे तेवढा द्वाररक्षक याजक
त्या पेटींत टाकीत. १० नंतर पेटींत पुष्कळ पैसा
झाला आहे असें पाहून राजाचा चिटणीस व मुख्य
याजक यांनीं येऊन तो परमेश्वराच्या मंदिरांत
मिळालेला पैसा थैल्यांत बांधून तोलिला. ११ तो पैसा
तोलून जे परमेश्वराच्या मंदिराच्या दुरुस्तीचें काम
पाहण्यासाठीं नेमिलेले होते त्यांच्या हवालीं तो केला;
त्यांनीं तो परमेश्वराच्या मंदिराचें काम करणारे सुतार व
बांधकाम करणारे, १२ गवंडी व पाथरवट यांस दिला
तसेंच इमारती लाकूड व घडलेले चिरे विकत घेण्यास
व मंदिरांत मोडतोड झाली होती तिची दुरुस्ती करण्यांत
खर्चिला. १३ जे पैसे परमेश्वराच्या मंदिरीं येत ते
रुप्याचे पेले, चिमटे, कटोरे, करणे अथवा सोन्या-
रुप्याचीं पात्रें करण्यांत खर्चिले नाहींत; १४ तर
ते सगळे पैसे कामगारांस दिले व त्यांनीं ते घेऊन
परमेश्वराच्या मंदिराची दुरुस्ती केली. १५ काम-
कऱ्यांस देण्यासाठीं ज्यांच्या हातीं हा पैसा देत असत
त्यांचा कांहीं हिशोब ठेविला नाहीं; कारण ते आपलें
काम सचोटीनें करीत असत. १६ दोषार्पणें व पापा-
र्पणें यांचा पैसा येत असे तो मंदिरांत जमा करीत
नसत; तो पैसा याजकांचा असे.

१७ पुढें अरामाचा राजा हजाएल यानें स्वारी
करून गथ घेतलें आणि नंतर यरुशलेमाकडे आपला
मोर्चा फिरविला. १८ तेव्हां यहूदाचा राजा यहोआश
यानें असें केलें: त्याचे वाडवडील, यहोशाफाट, यहोराम
व अहज्या या यहूदाच्या राजांनीं व त्यानें स्वतः ज्या
वस्तु परमेश्वरास वाहिल्या होत्या त्या, आणि परमेश्वराच्या
मंदिराच्या व राजभवनाच्या भांडारांत जेवढें सोनें
सांपडलें तें सर्व घेऊन त्यानें अरामाचा राजा हजाएल
याजकडे पाठविलें; तेव्हां तो यरुशलेमाजवळून निघून
गेला. १९ यहोआशाचीं बाकीचीं कृत्यें व त्यानें जें
कांहीं केलें या सर्वांचें वर्णन यहूदाच्या राजांच्या
बखरींत केलें आहे, नाहीं काय? २० यहोआश राजाच्या
चाकरांनीं फितुर केला आणि त्यास सिल्लाकडे जाणाऱ्या
रस्त्यावर मिल्लो नांवाच्या वाड्यांत जिवें मारिलें.

२१ योजाखार बिन शिमाथ व यहोजाबाद बिन शोमर
या त्याच्या चाकरांनीं त्यास जिवें मारिलें; तो मेल्यावर
त्यांनीं त्यास दाविदपुरांत त्याच्या वाडवडिलांच्या थडग्यांत
मूठमाती दिली; त्याचा पुत्र अमस्या त्याच्या जागीं
राजा झाला.

१३ १ यहूदाचा राजा अहज्याचा पुत्र योवाश
याच्या कारकीर्दीच्या तेविसाव्या वर्षी येहूचा पुत्र
यहोआहाज शोमरोनांत इस्राएलावर राज्य करूं
लागला; त्यानें सतरा वर्षें राज्य केलें. २ परमेश्वराच्या
दृष्टीनें जें वाईट तें त्यानें केलें; नबाटाचा पुत्र यराबाम
यानें इस्राएलांच्या हातून जीं पापकर्में करविलीं त्यांचें
अवलंबन त्यानें केलें; तीं त्यानें सोडून दिलीं नाहींत.
३ यास्तव इस्राएलावर परमेश्वराचा कोप भडकला व
त्यानें त्यांस यहोआहाज हयात होता तोंपर्यंत अरामाचा
राजा हजाएल व त्याचा पुत्र बेन-हदाद यांच्या स्वाधीन
केलें. ४ यहोआहाजानें परमेश्वरापाशीं विनवणी केली
ती त्यानें ऐकली; अरामाचा राजा इस्राएलास कसा
गांजीत होता हें परमेश्वरानें पाहिलें होतें. ५ परमेश्वरानें
इस्राएलास सोडविणारा दिला तेव्हां इस्राएल लोक
अरामाच्या काबूंतून सुटून आपआपल्या डेऱ्यांत पूर्वी-
प्रमाणें राहूं लागले. ६ तरी यराबामाच्या घराण्यानें जीं
पापकर्में केलीं व जीं त्यानें इस्राएल लोकांकडून करविलीं
त्या पापकर्मांप्रमाणें ते चालले; शोमरोनांत अशेरा
मूर्तिहि राहिल्या होत्या. ७ अरामाच्या राजानें
यहोआहाजाच्या सैन्यांत केवळ पन्नास स्वार, दहा रथ
व दहा हजार पायदळ एवढेंच राहूं दिलें होतें व
इस्राएलांचा नाश करून त्यांस तुडवून धुळीस मिळविलें
होतें. ८ यहोआहाज याचीं बाकीचीं कृत्यें, त्यानें जें
कांहीं केलें तें व त्याचा पराक्रम या सर्वांचें वर्णन
इस्राएलाच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय ?
९ यहोआहाज आपल्या पितरांजवळ जाऊन निजला व
त्यास शोमरोनांत मूठमाती दिली; त्याचा पुत्र योवाश
हा त्याच्या जागीं राजा झाला.

१० यहूदाचा राजा योवाश याच्या कारकीर्दीच्या
सदतिसाव्या वर्षी यहोआहाजाचा पुत्र यहोआश शोम-
रोनांत इस्राएलावर राज्य करूं लागला; त्यानें सोळा वर्षें
राज्य केलें. ११ परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें
केलें; नबाटाचा पुत्र यराबाम यानें इस्राएलाकडून जीं
पापकर्में करविलीं होतीं तीं त्यानें सोडिलीं नाहींत;
त्यांप्रमाणें तो चालला. १२ योवाशाचीं बाकीचीं कृत्यें,
त्यानें जें कांहीं केलें तें आणि यहूदाचा राजा अमस्या
याशीं तो कशा शौर्यानें लढला या सर्वांचें वर्णन
इस्राएलाच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय ?
१३ योवाश आपल्या पितरांजवळ जाऊन निजला
आणि यराबाम त्याच्या गादीवर बसला; योवाशाला
शोमरोनांत इस्राएलाच्या राजांबरोबर मूठमाती दिली.

१४ ज्या दुखण्यानें अलीशा मरावयाचा होता तें
त्याला आतां लागलें; तेव्हां इस्राएलाचा राजा योवाश
त्याजकडे गेला व ओणवून त्याचें मुख पाहून रडूं
लागला व म्हणाला, अहो बाबा ! अहो बाबा !
इस्राएलाच्या रथांनो ! इस्राएलाच्या राउतांनो !
१५ अलीशानें त्यास सांगितलें, धनुष्यबाण घेऊन ये;
तेव्हां तो धनुष्यबाण घेऊन त्याजकडे आला.
१६ त्यानें इस्राएलाच्या राजास सांगितलें, धनुष्याला
आपला हात लाव; त्यानें आपला हात धनुष्यास
लाविला; तेव्हां अलीशानें आपले हात राजाच्या
हातांवर ठेविले. १७ मग त्यानें सांगितलें, पूर्वेकडील
खिडकी उघड; त्यानें ती उघडली. मग अलीशा
त्यास म्हणाला, बाण सोड; तेव्हां त्यानें तो सोडिला. तो
म्हणाला, हा बाण परमेश्वराकडून होणाऱ्या सोड-
वणुकीचें म्हणजे अरामापासून सुटण्याचें चिन्ह होय;
तूं अफेक येथें अराम्यांस असा मार देशील कीं त्यांचा
धुव्वा उडेल. १८ त्यानें त्यास म्हटलें, बाण उचलून
घे; त्यानें ते उचलून घेतले, मग तो इस्राएलाच्या
राजास म्हणाला, जमिनीवर बाण मार; तो तीनदा
मारून थांबला. १९ देवाचा माणूस त्याजवर रागावून
म्हणाला, तूं पांचसहा वेळां बाण मारावयाचे
असते, म्हणजे अरामाचा क्षय होईपर्यंत तूं त्यास मार
दिला असतास; आतां तूं त्यास तीन वेळां मात्र
मार देशील.

२० अलीशा मृत्यु पावला व लोकांनीं त्यास मूठ-
माती दिली. नव्या वर्षाच्या आरंभीं मवाबी टोळ्यांनीं
देशावर स्वारी केली. २१ तेव्हां लोक एका मनुष्यास
मूठमाती देत असतां त्यांच्या नजरेस एक टोळी पडली;
आणि त्यांनीं तें प्रेत अलीशाच्या कबरेंत टाकिलें, तेव्हां
अलीशाच्या अस्थींस स्पर्श झाल्याबरोबर तो मनुष्य
जीवंत होऊन पायांवर उभा राहिला.

२२ यहोआहाज याच्या सर्व हयातींत अरामाचा
राजा हजाएल यानें इस्राएलांस त्रस्त केलें. २३ तरी
परमेश्वराची त्यांजवर कृपा होती; देवानें अब्राहाम,
इसहाक व याकोब यांशीं केलेल्या करारामुळें त्याची
इस्राएलांवर कृपा होती; त्यांचा त्यास कळवळा होता
व त्यांजवर त्याची मेहेरनजर होती, म्हणून त्यानें
त्यांचा अद्यापि नाश केला नाहीं व आपल्यासमोरून
त्यांस दूर केलें नाहीं. २४ अरामाचा राजा हजाएल
हा मृत्यु पावला आणि त्याचा पुत्र बेन-हदाद त्याच्या
जागीं राजा झाला. २५ बेन-हदाद बिन हजाएल यानें
यहोआहाज याच्याशीं युद्ध करून जीं नगरें घेतलीं होतीं
तीं त्याचा पुत्र यहोआश यानें परत घेतलीं. योवाशानें
त्याला तीनदा मार देऊन इस्राएली नगरें परत घेतलीं.

१४ १ इस्राएलाचा राजा यहोआहाज याचा पुत्र
योवाश याच्या कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षी
यहूदाचा राजा योवाश याचा पुत्र अमस्या
राज्य करूं लागला. २ तो राज्य करूं लागला तेव्हां
पंचवीस वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत एकुणतीस
वर्षें राज्य केलें; त्याच्या आईचें नांव यहोअदान होतें;
ती यरुशलेमची होती. ३ परमेश्वराच्या दृष्टीनें जें
नीट तें तो करी; तरी त्याचा पूर्वज दावीद
याच्या तोडीचा तो नव्हता, त्याचा बाप योवाश
याच्या करणीप्रमाणें त्याची सगळी करणी होती.
४ उच्चस्थानें कांहीं काढून टाकण्यांत आलीं नव्हतीं;
लोक अजून त्या स्थानीं यज्ञ करीत व धूप
जाळीत. ५ त्याच्या हातीं राजसत्ता पुरी आली तेव्हां
त्याचा बाप जो राजा त्याचा घात ज्या चाकरांनीं केला
होता त्यांस त्यानें जिवें मारिलें; ६ पण खून
करणाऱ्यांचीं मुलेंबाळें त्यानें जिवें मारिलीं नाहींत;
कारण मोशाच्या नियमशास्त्रांत परमेश्वरानें असें विहित
केलें आहे कीं पुत्रांकरितां पित्यांना, पित्यांकरितां पुत्रांना
मारूं नये; जो तो आपल्याच पापामुळें प्राणास
मुकावा. ७ त्यानें क्षारखोऱ्यांत अदोमाच्या दहा हजार
लोकांस मारून टाकिलें; सेला नगर लढून घेतलें व
त्याचें नांव बदलून तें यकथेल असें ठेविलें; आजवर तें
नांव चालू आहे.

८ मग अमस्यानें इस्राएलाचा राजा यहोआश बिन
यहोआहाज बिन येहू यास जासुदांच्या हातीं निरोप
पाठविला कीं चल, आपण सामना करूं. ९ इस्राएलाचा
राजा यहोआश यानें यहूदाचा राजा अमस्या यास
सांगून पाठविलें कीं लबानोनांतल्या कांटेझुडपानें
लबानोनांतल्याच एका गंधसरूकडे मागणी केली कीं
तुझी मुलगी माझ्या मुलास दे; लबानोनांत असलेला
एक वनपशु त्या वाटेनें गेला व त्यानें तें कांटेझुडूप
पायांखालीं तुडवून टाकिलें. १० तूं अदोमाचा मोड
केल्यामुळें तुझें हृदय उन्मत्त झालें आहे; त्याविषयींची
फुशारकी मारीत आपल्या घरीं बैस; तूं पतन पावशील
व तुजबरोबर यहूदा पतन पावेल; तर तूं होऊन
अरिष्टास कां आमंत्रण करीत आहेस? ११ अमस्या
कांहींकेल्या ऐकेना. तेव्हां इस्राएलाचा राजा यहोआश
चढाई करून गेला; तो व यहूदाचा राजा अमस्या यांचा
यहूदा देशांतील बेथ-शेमेश येथें सामना झाला.
१२ इस्राएलापुढें यहूदाची त्रेधा उडाली आणि ज्यानें
त्यानें आपआपल्या डेऱ्याकडे पळ काढिला. १३ इस्रा-
एलाचा राजा यहोआश यानें यहूदाचा राजा अमस्या
बिन यहोआश बिन अहज्या याला बेथ-शेमेश येथें
पकडिलें; त्यानें यरुशलेमास जाऊन एफ्राइमी वेशीपासून
कोपऱ्यावरील वेशीपर्यंत यरुशलेमाचा चारशें हात
कोट पाडून टाकिला. १४ सोनें, रुपें, परमेश्वराच्या
मंदिरांत व राजभवनाच्या भांडारांत त्याला सांपडलीं
तेवढीं सगळीं पात्रें व कैदी हीं घेऊन तो
शोमरोनास परत गेला. १५ यहोआशानें केलेलीं

१ मुळांत: योआहाज.

बाकीचीं कृत्यें, त्याचा पराक्रम, तो यहूदाचा राजा
अमस्या याशीं कसा लढला या सर्वांचें वर्णन इस्राएलाच्या
राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय? १६ यहो-
आश आपल्या पितरांजवळ जाऊन निजला; त्यास शोम-
रोनांत इस्राएलाच्या राजांमध्यें मूठमाती देण्यांत आली;
त्याचा पुत्र यराबाम हा त्याच्या जागीं राजा झाला.

१७ इस्राएलाचा राजा यहोआश बिन यहोआहाज
याच्या मृत्यूनंतर यहूदाचा राजा अमस्या बिन योवाश
हा पंधरा वर्षें जगला. १८ अमस्याचीं बाकीचीं कृत्यें
यहूदाच्या राजांच्या बखरींत वर्णिलेलीं आहेत, नाहींत
काय? १९ यरुशलेमांत त्याजविरुद्ध कट झाल्यामुळें तो
लाखीश येथें पळून गेला, पण लोकांनीं त्याच्या पाठोपाठ
लाखीश येथें मनुष्य पाठवून त्याला ठार केलें; २० त्यास
घोड्यांवर घालून आणिलें आणि यरुशलेमांत दावीदपुरांत
त्याच्या पूर्वजांमध्यें मूठमाती दिली. २१ मग सर्व यहूदी
लोकांनीं सोळा वर्षांच्या अजऱ्यास[1], त्याचा बाप अमस्या
याच्या जागीं, राजा केलें. २२ अमस्या राजा आपल्या
पितरांजवळ जाऊन निजल्यावर अजऱ्यानें एलाथाची
मजबुती करून पुनः तें यहूदाच्या सत्तेंत आणिलें.

२३ यहूदाचा राजा अमस्या बिन योवाश याच्या
कारकीर्दीच्या पंधराव्या वर्षी इस्राएलाचा राजा यराबाम
बिन योवाश शोमरोनांत राज्य करूं लागला; त्यानें
एकेचाळीस वर्षें राज्य केलें. २४ परमेश्वराच्या दृष्टीनें
जें वाईट तें त्यानें केलें; नबाटपुत्र यराबाम यानें इस्रा-
एलाकडून जीं पापकर्में करविलीं त्याचें त्यानें अवलंबन
केलें, तीं त्यानें सोडून दिलीं नाहींत. २५ इस्राएलाचा
देव परमेश्वर यानें गथ-हेफेर येथील आपला सेवक
योना बिन अमित्तय या संदेष्ट्याच्या द्वारें जें सांगितलें
होतें त्याप्रमाणें यराबामानें हमाथाच्या घाटापासून
अराबाच्या समुद्रापर्यंत इस्राएलाचा गेलेला मुलूख परत
घेतला. २६ इस्राएलास दुःसह क्लेश होत आहेत असें
परमेश्वरानें पाहिलें; बंदिवासांत किंवा मोकळा असा
कोणीहि उरला नव्हता; इस्राएलाचा साहाय्यकारी
असा कोणीच राहिला नव्हता. २७ या नभोमंडला-
खालून इस्राएलाची नांवनिशाणी मी नाहींशी करीन असें
परमेश्वर म्हणाला नव्हता, म्हणून त्यानें योवाशाचा पुत्र
यराबाम याच्या द्वारें त्यांची सोडवणूक केली. २८ यरा-
बामाचीं बाकीचीं कृत्यें, त्यानें जें केलें तें सर्व, त्याचा
पराक्रम, त्याचीं युद्धें व पूर्वी यहूदाच्या सत्तेंत असलेली
दिमिष्क व हमाथ हीं त्यानें कशीं परत घेतलीं या सर्वांचें
वर्णन इस्राएलाच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं
काय? २९ मग यराबाम आपले पितर इस्राएलाचे
राजे यांजजवळ जाऊन निजला आणि त्याचा पुत्र
जखऱ्या हा त्याच्या जागीं राजा झाला.

१ इस्राएलाचा राजा यराबाम याच्या कार-
१५ कीर्दीच्या सत्ताविसाव्या वर्षी यहूदाचा राजा
अजऱ्या[1] बिन अमस्या राज्य करूं लागला. २ तो
राज्य करूं लागला तेव्हां सोळा वर्षांचा होता; त्यानें
यरुशलेमांत बावन्न वर्षें राज्य केलें; त्याच्या आईचें
नांव यखल्या; ती यरुशलेमकरीण होती. ३ त्याचा
बाप अमस्या याच्या एकंदर वागणुकीस अनुसरून
परमेश्वराच्या दृष्टीनें जें नीट तें तो करी. ४ तरी
उच्चस्थानें काढून टाकण्यांत आलीं नव्हतीं; लोक अद्यापि
उच्चस्थानीं यज्ञ करीत व धूप जाळीत. ५ परमेश्वरानें
राजाला अशी शिक्षा केली कीं तेणेंकरून तो आमरण
कोडी झाला; तो निराळ्या घरांत राहत असे. राजपुत्र
योथाम हा त्याचा खानगी कारभारी होऊन देशांतील
लोकांचा न्यायइनसाफ करीत असे. ६ अजऱ्याच्या
बाकीच्या कृत्यांचें व त्यानें जें कांहीं केलें त्या सर्वांचें वर्णन
यहूदाच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय?
७ अजऱ्या आपल्या पितरांजवळ जाऊन निजला; त्यांनीं
त्यास दावीदपुरांत त्याच्या वाडवडिलांमध्यें मूठमाती
दिली. त्याचा पुत्र योथाम हा त्याच्या जागीं राजा झाला.

८ यहूदाचा राजा अजऱ्या याच्या कारकीर्दीच्या
अडतिसाव्या वर्षी जखऱ्या बिन यराबाम इस्राएलावर
शोमरोनांत राज्य करूं लागला; त्यानें सहा महिने राज्य
केलें. ९ त्यानें आपल्या वाडवडिलांप्रमाणें परमेश्वराच्या
दृष्टीनें जें वाईट तें केलें; नबाटपुत्र यराबाम यानें इस्रा-

१ **अथवा** : उज्जीयास

१ **अथवा** : उज्जीया; १५:१३, ३०-३४ पाहा.

एलाकडून जीं पापकर्में करविलीं तीं त्यानें सोडून दिलीं
नाहींत. १० याबेशाचा पुत्र शल्लूम यानें त्याच्याशीं
फितुरी करून व त्यास लोकांदेखत मार देऊन वधिलें,
आणि त्याच्या जागीं तो राजा झाला. ११ जखऱ्याचीं
बाकीचीं कृत्यें इस्राएलाच्या राजांच्या बखरींत
वर्णिलेलीं आहेत तीं पाहा. १२ परमेश्वरानें येहूस
सांगितलें होतें कीं चौथ्या पिढीपर्यंत तुझे वंशज इस्रा-
एलाच्या गादीवर बसतील, त्याप्रमाणें घडून आलें.

१३ यहूदाचा राजा उज्जीया याच्या कारकीर्दीच्या
एकुणचाळिसाव्या वर्षी शल्लूम बिन याबेश हा राज्य करूं
लागला; त्यानें शोमरोनांत एक महिना राज्य केलें.
१४ मनहेम बिन गादी हा तिरसा येथून शोमरोनास
गेला आणि तेथें त्यानें शल्लूम बिन याबेश यास मार
देऊन वधिलें, आणि त्याच्या जागीं तो राजा झाला.
१५ शल्लूमाचीं बाकीचीं कृत्यें व त्यानें केलेलें बंड या
सर्वांचें इस्राएलाच्या राजांच्या बखरींत वर्णन केलें आहे
तें पाहा. १६ मग मनहेमानें तिरसा येथून निघून
तिफसाहांत व त्याच्या शिवारांत राहणाऱ्या लोकांस मार
दिला; त्यांनीं त्याला आपल्या वेशी उघडिल्या नाहींत
म्हणून त्यानें त्यांस हा मार दिला; त्यानें तेथल्या सर्व
गर्भवती स्त्रिया चिरून काढिल्या.

१७ यहूदाचा राजा अजऱ्या याच्या कारकीर्दीच्या
एकुणचाळिसाव्या वर्षी मनहेम बिन गादी इस्राएलावर
राज्य करूं लागला; त्यानें दहा वर्षें शोमरोनांत राज्य
केलें. १८ परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें
केलें; नबाटपुत्र यराबाम यानें इस्राएलाकडून जीं पाप-
कर्में करविलीं तीं त्यानें आमरण सोडिलीं नाहींत.
१९ अश्शूरचा राजा पूल यानें देशावर स्वारी केली
तेव्हां आपणास त्यानें टेका देऊन गादीवर आपली
स्थिर स्थापना करावी म्हणून मनहेमानें त्यास एक
हजार किक्कार चांदी दिली. २० अश्शूरच्या राजाला
देण्यासाठीं मनहेमानें इस्राएलांतल्या मोठमोठ्या
धनवान् लोकांकडून प्रत्येकीं पन्नास पन्नास शेकेल चांदी
काढिली. मग अश्शूरचा राजा परत गेला, देशांत
थांबला नाहीं. २१ मनहेमाचीं बाकीचीं कृत्यें व
त्यानें जें कांहीं केलें त्या सर्वांचें वर्णन इस्राएलाच्या
राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय? २२ मनहेम
आपल्या पितरांजवळ जाऊन निजला; आणि त्याचा पुत्र
पकह्या हा त्याच्या जागीं राजा झाला.

२३ यहूदाचा राजा अजऱ्या याच्या कारकीर्दीच्या
पन्नासाव्या वर्षी पकह्या बिन मनहेम शोमरोनांत इस्राएला-
वर राज्य करूं लागला; त्यानें दोन वर्षें राज्य केलें.
२४ परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें केलें.
नबाटपुत्र यराबाम यानें इस्राएलाकडून जीं पापकर्में
करविलीं तीं त्यानें सोडून दिलीं नाहींत. २५ त्याचा
सरदार रमाल्याचा पुत्र पेकह यानें त्याजशीं फितुरी
करून शोमरोनाच्या राजवाड्याच्या मनोऱ्यांत त्यास व
त्याजबरोबर अर्गोब व अरये यांस वधिलें; पेकहा-
बरोबर पन्नास गिलादी लोक होते; त्यांस वधून
त्याच्या जागीं तो राजा झाला. २६ पकह्याचीं
बाकीचीं कृत्यें व जें कांहीं त्यानें केलें त्या सर्वांचें इस्रा-
एलाच्या राजांच्या बखरींत वर्णन केलें आहे तें पाहा.

२७ यहूदाचा राजा अजऱ्या याच्या बावन्नाव्या वर्षी
पेकह बिन रमाल्या शोमरोन येथें इस्राएलावर राज्य
करूं लागला. त्यानें वीस वर्षें राज्य केलें. २८ परमे-
श्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें केलें; नबाटपुत्र
यराबाम यानें इस्राएलाकडून जीं पापकर्में करविलीं तीं
त्यानें सोडून दिलीं नाहींत. २९ इस्राएलाचा राजा
पेकह याच्या वेळीं अश्शूरचा राजा तिग्लथ-पिलेसर
यानें येऊन ईयोन, आबेल-बेथ-माका, यानोह,
केदेश, हासोर, गिलाद व गालील हीं सर्व नफताली
प्रांतांतील स्थळें घेतलीं; तेथील लोक त्यानें पाडाव करून
अश्शूरास नेले. ३० उज्जीयाचा पुत्र योथाम याच्या
कारकीर्दीच्या विसाव्या वर्षी होशे बिन एला यानें पेकह
बिन रमाल्या याच्याशीं फितुरी करून त्यास मार
देऊन वधिलें आणि तो त्याच्या गादीवर बसला.
३१ पेकह याचीं बाकीचीं कृत्यें व त्यानें जें कांहीं केलें
त्या सर्वांचें वर्णन इस्राएलाच्या राजांच्या बखरींत

१ **अथवा:** अजऱ्या १५:१ वगैरे पाहा. २ निर्गम २५:३९ पाहा.

केलें आहे तें पाहा.
३२ इस्राएलाचा राजा पेकह बिन रमाल्या याच्या
कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षी यहूदाचा राजा योथाम बिन
उज्जीया राज्य करूं लागला. ३३ तो राज्य करूं लागला
तेव्हां पंचवीस वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत सोळा
वर्षें राज्य केलें; त्याच्या आईचें नांव यरुशा असें
होतें; ती सादोकाची कन्या. ३४ परमेश्वराच्या दृष्टीनें
जें ठीक तें त्यानें केलें; त्याचा बाप उज्जीया याच्या
एकंदर वागणुकीप्रमाणें तो वागला. ३५ तरी उच्चस्थानें
काढून टाकण्यांत आलीं नव्हतीं; लोक अद्यापि उच्चस्थानीं
यज्ञ करीत व धूप जाळीत. परमेश्वराच्या मंदिराचा वरला
दरवाजा त्यानें बांधिला. ३६ योथामाचीं बाकीचीं कृत्यें
व जें कांहीं त्यानें केलें त्या सर्वांचें वर्णन यहूदाच्या
राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय? ३७ त्या
काळीं अरामाचा राजा रसीन व रमाल्याचा पुत्र पेकह
यांस परमेश्वर यहूदावर चढाई करण्यास पाठवूं
लागला. ३८ योथाम आपल्या पितरांजवळ जाऊन
निजला; त्याचा पूर्वज दावीद याच्या पुरांत त्याच्या
पितरांमध्यें त्यास मूठमाती दिली; त्याचा पुत्र आहाज
हा त्याच्या जागीं राजा झाला.

१६ १ पेकह बिन रमाल्या याच्या कारकीर्दीच्या
सतराव्या वर्षी यहूदाचा राजा आहाज बिन
योथाम राज्य करूं लागला. २ आहाज राज्य
करूं लागला तेव्हां तो वीस वर्षांचा होता; त्यानें
यरुशलेमांत सोळा वर्षें राज्य केलें; त्याचा पूर्वज
दावीद यानें आपला देव परमेश्वर याच्या दृष्टीनें जें
योग्य तें केलें होतें त्याप्रमाणें त्यानें केलें नाहीं. ३ तो
इस्राएलाच्या राजांच्या मार्गानें चालला; ज्या राष्ट्रांस
परमेश्वरानें इस्राएल लोकांपुढून घालविलें होतें त्यांच्या
अमंगळ आचारांस अनुसरून त्यानें आपल्या पुत्राचा
अग्नींत होम करून त्याला अर्पिलें. ४ तो उच्चस्थानीं,
पहाडांवर व प्रत्येक हिरव्या वृक्षाखालीं यज्ञ करीत असे
व धूप जाळीत असे. ५ मग अरामाचा राजा रसीन आणि
इस्राएलाचा राजा पेकह बिन रमाल्या हे यरुशलेमावर
चढाई करून युद्धास आले; त्यांनीं आहाजास वेढा
दिला पण त्यांना त्यास जिंकितां आलें नाहीं. ६ त्या वेळीं
अरामाचा राजा रसीन यानें एलाथ नांवाचें नगर सर
करून पुनः अरामांत सामील केलें व तेथल्या यहूदी
लोकांस हाकून दिलें; अरामी लोक तेथें जाऊन
राहिले, ते आजपर्यंत तेथेंच राहत आहेत. ७ मग
आहाजानें अश्शूरचा राजा तिग्लथ-पिलेसर यास
जासुदांच्या हातीं सांगून पाठविलें कीं मी आपला सेवक,
आपला मुलगा आहें; तर आतां अरामाचा राजा व
इस्राएलाचा राजा हे मजवर चढाई करून आले
आहेत. आपण येऊन त्यांच्या हातून माझा बचाव करा.
८ परमेश्वराच्या मंदिरांत व राजवाड्याच्या भांडारांत
जेवढें सोनेंरुपें आहाजास सांपडलें तेवढें त्यानें
अश्शूरच्या राजाकडे नजराणा म्हणून पाठविलें.
९ त्याचें मागणें मान्य करून अश्शूरच्या राजानें
दिमिष्कावर चढाई करून तें घेतलें व तेथील लोकांस
पाडाव करून कीर येथें नेलें; आणि रसीन याचा वध
केला. १० तेव्हां अश्शूरचा राजा तिग्लथ-पिलेसर याच्या
भेटीसाठीं आहाज राजा दिमिष्क येथें गेला; त्यानें
तेथील वेदी पाहून तिचा आकार व तिची घडण
यांचा नमुना उरीया याजकाकडे पाठवून दिला.
११ आहाज राजानें दिमिष्काहून पाठविलेल्या त्या
नमुन्याप्रमाणें उरीया याजकानें एक वेदी आहाज राजा
दिमिष्काहून येण्यापूर्वी तयार केली. १२ राजा दिमिष्का-
हून परत आला तेव्हां त्यानें ती वेदी पाहिली; त्यानें
त्या वेदीजवळ जाऊन तिच्यावर बलि अर्पिले. १३ त्या
वेदीवर त्यानें आपले होमबलि व अन्नबलि यांचे होम
केले, आपलीं पेयार्पणें तिच्यावर ओतिलीं व आपल्या
शांत्यर्पणांच्या बलींचें रक्त त्या वेदीवर शिंपडिलें.
१४ परमेश्वरापुढें असलेली पितळेची वेदी जी मंदिरा-
पुढें म्हणजे वेदी व परमेश्वराचें मंदिर यांच्या दरम्यान
होती ती तेथून काढून त्यानें तयार केलेल्या त्या
वेदीच्या उत्तरेकडे ठेविली. १५ आहाज राजानें उरीया
याजकास आज्ञा केली कीं नित्य सकाळच्या होमबलि,
संध्याकाळचा अन्नबलि, राजाचे होमबलि व अन्नबलि,
आणि देशांतील सगळ्या लोकांचे होमबलि व पेयार्पणें

हीं मोठ्या वेदीवर अर्पावीं; होमबलि व इतर यज्ञपशु
यांचें रक्त त्या वेदीवर शिंपडावें; पितळेची वेदी मज-
साठीं शकुन पाहण्याकरितां असावी. १६ आहाज राजाच्या
आज्ञेप्रमाणें उरीया याजकानें केलें. १७ मग आहाज
राजानें बैठकींवरलें नकशीकाम काढून टाकिलें आणि
त्यांवर असलेलें गंगाळ काढिलें, आणि गंगाळसागर
पितळी बैलांवरून काढून खालीं फरसबंदीवर ठेविला.
१८ शब्बाथ दिवसासाठीं जी चांदणी मंदिरांत बांधिली
होती ती व राजास बाहेरून प्रवेश करण्यासाठीं जें द्वार
केलें होतें तें हीं दोन्ही अश्शूरच्या राजाच्या भीतीनें
परमेश्वराच्या मंदिरापासून वेगळीं करण्यांत आलीं.
१९ आहाजानें केलेल्या बाकीच्या गोष्टी यहूदाच्या
राजांच्या बखरींत वर्णिल्या आहेत, नाहींत काय?
२० आहाज आपल्या पितरांजवळ जाऊन निजला;
त्याला दावीदपुरांत त्याच्या पितरांमध्यें मूठमाती दिली;
त्याचा पुत्र हिज्कीया हा त्याच्या जागीं राजा झाला.

१ यहूदाचा राजा आहाज याच्या कार-
**१७** कीर्दीच्या बाराव्या वर्षी होशे बिन एला हा
शोमरोनांत इस्राएलावर राज्य करूं लागला;
त्यानें नऊ वर्षें राज्य केलें. २ परमेश्वराच्या दृष्टीनें
वाईट तें त्यानें केलें, तरी तें त्याच्यापूर्वी होऊन
गेलेल्या इस्राएलाच्या राजांएवढें नव्हतें. ३ अश्शूरचा
राजा शल्मनेसर हा त्याजवर चढाई करून आला; होशे
त्याचा अंकित झाला व त्यानें त्यास खंडणी दिली.
४ अश्शूरच्या राजास होशेची फितुरी दिसून आली;
त्यानें मिसर देशाचा राजा सो याजकडे जासूद पाठविले
आणि दर वर्षी जी खंडणी तो अश्शूरच्या राजास देत
असे ती देण्याचें बंद केलें, म्हणून अश्शूरच्या
राजानें त्यास पकडून बिड्या घालून कारागृहांत ठेविलें.
५ मग अश्शूरच्या राजानें सर्व देशावर स्वारी केली
आणि शोमरोनास जाऊन तो तीन वर्षें वेढा घालून
राहिला. ६ होशेच्या कारकीर्दीच्या नवव्या वर्षी
अश्शूरच्या राजानें शोमरोन सर केलें व इस्राएल
लोकांस अश्शूर देशीं नेऊन हलह व हाबोर येथें व
गोजान नदीतीरीं व मेद्यांच्या नगरांतून वसविलें.
७ याचें कारण असें कीं इस्राएलाचा देव परमेश्वर यानें
त्यांस मिसर देशाचा राजा फारो याच्या हातांतून सोड-
वून मिसर देशांतून बाहेर आणिलें होतें त्याच्याविरुद्ध
त्यांनीं पाप केलें व अन्य देवांची पूजा केली, ८ आणि
ज्या राष्ट्रांस परमेश्वरानें इस्राएल लोकांपुढून घालविलें
होतें त्यांचे नियम व इस्राएलांच्या राजांनीं आचर-
णांत आणिलेले नियम यांचें त्यांनीं अवलंबन केलें
होतें. ९ तसेंच इस्राएल लोकांनीं आपला देव परमे-
श्वर याच्याविरुद्ध अनुचित गोष्टी गुप्तपणें केल्या;
पहारेकऱ्यांचे बुरुज असोत कीं तटबंदीचीं नगरें असोत;
अशा आपल्या सर्व नगरांत त्यांनीं उच्चस्थानें स्थापिलीं.
१० त्यांनीं सर्व उंच पहाडांवर व प्रत्येक हिरव्या
झाडाखालीं मूर्तिस्तंभ व अशेरा मूर्ति स्थापिल्या;
११ आणि परमेश्वरानें जीं राष्ट्रें त्यांच्यापुढून घालविलीं
होतीं त्यांच्याप्रमाणें त्यांनीं सगळ्या उच्चस्थानीं धूप
जाळिला आणि परमेश्वरास संताप येईल अशा प्रकारचीं
वाईट कर्में केलीं. १२ परमेश्वरानें त्यांस मूर्तींची
उपासना करूं नका असें सांगितलें असूनहि त्यांनीं
त्यांची उपासना केली. १३ तरी परमेश्वरानें सर्व संदेष्टे
व द्रष्टे यांच्या द्वारें इस्राएल व यहूदा यांस बजावून
सांगितलें होतें कीं तुम्ही आपले वाईट मार्ग सोडून
तुमच्या पूर्वजांस जें सगळें धर्मशास्त्र मीं विहित करून
माझे सेवक संदेष्टे यांच्या हातीं तुम्हांकडे
पाठविलें होतें त्यास अनुसरून माझ्या आज्ञा व नियम
पाळावे. १४ इतकें असूनहि ते ऐकतना; तर
त्यांच्या पूर्वजांनीं आपला देव परमेश्वर याजवर
विश्वास न ठेवितां मान ताठ केली त्याप्रमाणें त्यांनीं
केली; १५ आणि त्यांनीं त्याचे नियम, त्यांच्या वाड-
वडिलांशीं केलेला त्याचा करार व त्यांस पढविलेले
त्याचे निर्बंध यांचा त्यांनीं अव्हेर केला, ते भ्रामक
गोष्टींच्या मागें लागून भ्रांत झाले आणि ज्या
आसपासच्या परराष्ट्रांप्रमाणें करूं नका असें परमेश्वरानें
त्यांस बजाविलें होतें त्यांचें त्यांनीं अनुकरण केलें.
१६ त्यांनीं आपला देव परमेश्वर याच्या सर्व आज्ञा
सोडून देऊन वासरांच्या दोन ओतींव मूर्ति तयार

केल्या; त्यांनीं अशेरा मूर्ति केली, सर्व नक्षत्रगणांची
पूजा केली; आणि बालमूर्तींची उपासना केली. १७ त्यांनीं
आपले पुत्र व कन्या यांचे अग्नींत होम करून तीं अर्पिलीं;
ते शकुनमुहूर्त पाहूं लागले व जादूटोणा करूं लागले आणि
जें परमेश्वराच्या दृष्टीनें वाईट व ज्यामुळें त्यास संताप
येतो तें करण्यास त्यांनीं आपणांस वाहून घेतलें.
१८ त्यामुळें परमेश्वर इस्राएलावर अति कोपायमान
झाला; त्यानें त्यास आपल्या दृष्टीआड केलें; यहूदाचा
वंश खेरीज करून कोणी उरला नाहीं. १९ यहूदा-
नेंहि आपला देव परमेश्वर याच्या आज्ञा पाळिल्या
नाहींत; इस्राएलानें जे नियम आचरिले त्यांचें त्यानें
अवलंबन केलें; २० म्हणून परमेश्वरानें इस्राएलाच्या
सर्व वंशजांचा त्याग करून त्यांस पीडिलें, त्यांस
लुटणाऱ्यांच्या हातीं दिलें व शेवटीं त्यांस आपल्या दृष्टी-
समोरून घालवून दिलें. २१ त्यानें इस्राएलास दाविदाच्या
घराण्यापासून निराळें केलें. तेव्हां लोकांनीं नबाटपुत्र
यराबाम यास आपला राजा केलें; त्या यराबामानें
इस्राएलास परमेश्वराच्या मार्गापासून परावृत्त करून
त्यांच्याकडून महापातक करविलें. २२ यराबामानें
जीं पातकें केलीं त्यांचें अनुकरण इस्राएल लोकांनीं
केलें; त्यांनीं तीं पातकें सोडून दिलीं नाहींत.
२३ शेवटीं परमेश्वरानें आपले सर्व सेवक जे संदेष्टे
त्यांच्या द्वारें सांगितल्याप्रमाणें इस्राएलास आपल्या
दृष्टीआड केलें. त्यांना स्वदेशांतून काढून अश्शूरास
नेण्यांत आलें; तेथेंच ते आजवर राहत आहेत.

२४ अश्शूरच्या राजानें बाबेल, कूथा, अव्वा, हमाथ
व सफरवाईम या ठिकाणचे लोक आणून इस्राएल
लोकांच्या जागीं शोमरोनांतील नगरांतून वसविले;
शोमरोन ताब्यांत घेऊन त्यांतील नगरांत ते राहूं
लागले. २५ ते तेथें वस्ती करून राहूं लागले तेव्हां ते
आरंभीं परमेश्वराचें भय बाळगीत नसत म्हणून परमे-
श्वरानें त्यांच्यामध्यें सिंह पाठविले; त्यांनीं त्यांतल्या
कित्येकांस मारून टाकिलें. २६ यामुळें त्यांनीं अश्शूरच्या
राजाकडे सांगून पाठविलें कीं आपण ज्या लोकांस
त्यांच्या देशांतून काढून शोमरोनांतील नगरांत वसविलें
त्यांस या देशच्या देवाची वहिवाट अवगत नाहीं;
म्हणून त्यानें त्यांच्यामध्यें सिंह पाठविले आहेत, त्यांनीं
त्यांतले कित्येक लोक मारून टाकिले आहेत, कारण
त्यांना या देशच्या देवाची वहिवाट ठाऊक नाहीं.
२७ मग अश्शूरच्या राजानें आज्ञा केली कीं जे याजक
तुम्हीं त्या देशांतून धरून आणिले आहेत त्यांतला एक
तिकडे पाठवून द्या; त्यानें तेथें जाऊन राहावें आणि
त्या देशच्या देवाची वहिवाट काय आहे ती त्यानें
लोकांस शिकवावी; २८ जे याजक शोमरोनांतून
धरून नेले होते त्यांतला एक येऊन बेथेल येथें राहिला;
परमेश्वराची भीति कशी धरावी हें तो लोकांस शिकवूं
लागला. २९ तथापि निरनिराळ्या राष्ट्रांच्या लोकांनीं
आपआपल्या मूर्ति बनविल्या, आणि ज्या नगरांत ते
वसले होते त्यांत शोमरोनी लोकांनीं उच्चस्थानें केलीं
होतीं तेथील मंदिरांतून त्या ठेविल्या. ३० बाबेलच्या
लोकांनीं सुक्कोथ-बनोथ, कूथ येथील लोकांनीं नेरगल,
हमाथ येथील लोकांनीं अशीमा, ३१ आणि अव्वी
येथील लोकांनीं निभज व तर्ताक अशीं दैवतें बनविलीं;
आणि सफरवी लोकांनीं आपल्या मुलांचा, सफरव्यांचीं
दैवतें अद्रम्मेलेक व अनम्मेलेक यांपुढें, अग्नींत होम करून
तीं अर्पिलीं. ३२ ते परमेश्वराचें भय बाळगीत तरी त्यांनीं
आपल्या सगळ्या लोकांतून मनुष्यें निवडून त्यांस
उच्चस्थानांचे याजक केलें; ते उच्चस्थानांच्या मंदिरांत
त्यांच्याप्रीत्यर्थ होमहवन करीत. ३३ ते परमेश्वराचें भय
धरीत खरे, तरी ज्या राष्ट्रांतून त्यांस आणिलें होतें त्यांच्या
रीतीप्रमाणें ते आपल्या दैवतांची उपासना करीत.
३४ ते आपल्या पूर्वीच्या वहिवाटींप्रमाणें आजवर
चालत आहेत; ते परमेश्वराचें भय बाळगीत नाहींत;
ते आपले स्वतांचे नियम व निर्णय पाळीत नाहींत
किंवा परमेश्वरानें ज्यांस इस्राएल हें नांव दिलें त्या
याकोबाच्या वंशजांस परमेश्वरानें विहित केलेलें धर्म-
शास्त्र व आज्ञा यांप्रमाणेंहि चालत नाहींत. ३५ परमे-
श्वरास याकोबाच्या वंशजांशीं करार करून त्यांस आज्ञा
केली होती कीं तुम्ही अन्य देवांचें भय धरूं नका,
त्यांस नमन करूं नका, त्यांची उपासना करूं नका व

त्यांस बलि अर्पूं नका; ३६ तर परमेश्वरानें महा-
सामर्थ्यानें व हात लांब करून तुम्हांस मिसर देशां-
तून बाहेर आणिलें त्याचें भय धरा, त्याची
आराधना करा आणि त्यालाच बलि अर्पा; ३७ आणि
जे नियम, निर्णय, धर्मशास्त्र व आज्ञा त्यानें
तुम्हांसाठीं लिहून ठेविल्या आहेत त्या निरंतर पाळा
व अन्य देवांचें भय धरूं नका; ३८ मीं तुमच्याशीं जो
करार केला आहे तो विसरूं नका व अन्य देवांचें
भय धरूं नका; ३९ केवळ तुमचा देव परमेश्वर याचें
भय धरा; तोच तुम्हांस तुमच्या शत्रूंच्या हातांतून
सोडवील. ४० तरी ते ऐकतना; ते आपल्या पूर्वीच्या
वहिवाटीप्रमाणें करीत. ४१ या प्रकारें हीं राष्ट्रें इकडे
परमेश्वराचें भय धरीत व तिकडे कोरींव मूर्तींचीहि
पूजा करीत; त्यांचे पूर्वज करीत त्याप्रमाणेंच त्यांचे
पुत्रपौत्र आजवर करीत आहेत.

१ इस्राएलाचा राजा होशे बिन एला याच्या
१८ कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षी यहूदाचा राजा
हिज्कीया बिन आहाज राज्य करूं लागला.
२ तो राज्य करूं लागला तेव्हां पंचवीस वर्षांचा
होता; त्यानें यरुशलेमांत एकुणतीस वर्षें राज्य केलें;
त्याच्या आईचें नांव अबी असें होतें; ती जखऱ्याची
कन्या. ३ त्याचा पूर्वज दावीद याच्या सर्व करणी-
प्रमाणें तो परमेश्वराच्या दृष्टीनें जें ठीक तें करी.
४ त्यानें उच्चस्थानें काढून टाकिलीं, मूर्तिस्तंभ फोडिले,
अशेरा मूर्तींचा उच्छेद केला व मोशानें केलेल्या पितळी
सर्पाचें चूर्ण केलें; कारण, हा काळापावेतों इस्राएल
लोक त्यापुढें धूप जाळीत असत; त्यास नहुश्तान
(पितळेचा तुकडा) हें नांव दिलें होतें. ५ इस्रा-
एलाचा देव परमेश्वर याजवर त्याचा भाव असे;
त्याच्यामागून यहूदाच्या सर्व राजांमध्यें त्याच्या
तोडीचा कोणी होऊन गेला नाहीं व त्याच्यापूर्वीहि
झाला नाहीं. ६ तो परमेश्वराला धरून राहिला; त्याचें
अनुसरण्याचें त्यानें सोडिलें नाहीं; परमेश्वरानें मोशाला
ज्या आज्ञा विहित केल्या होत्या त्या त्यानें पाळिल्या.
७ यास्तव परमेश्वर त्याच्याबरोबर होता; जिकडे-
जिकडे तो जाई तिकडेतिकडे त्यास यशःप्राप्ति होई;
त्यानें अश्शूरच्या राजाविरुद्ध बंडावा केला; त्याचा
तो अंकित राहिला नाहीं. ८ गज्जा व त्याचीं शिवारें
येथपर्यंत पहारेकऱ्यांच्या बुरुजापासून तटबंदीच्या
नगरापर्यंतच्या पलिष्ट्यांस त्यानें मार दिला.

९ हिज्कीया राजाच्या कारकीर्दीच्या चौथ्या वर्षी
म्हणजे इस्राएलाचा राजा होशे बिन एला याच्या
कारकीर्दीच्या सातव्या वर्षी अश्शूरचा राजा शल्मनेसर
यानें शोमरोनावर स्वारी करून त्यास वेढा दिला. १० तीन
वर्षांच्या अखेरीस त्यानें तें सर केलें; हिज्कीयाच्या
कारकीर्दीच्या सहाव्या वर्षी म्हणजे इस्राएलाचा
राजा होशे याच्या कारकीर्दीच्या नवव्या वर्षी शोमरोन सर
करण्यांत आलें. ११ मग अश्शूरच्या राजानें इस्राएलास
पाडाव करून अश्शूर देशीं नेलें आणि हलह व हाबोर येथें
आणि गोजान नदीतीरीं व मेद्यांच्या नगरांत त्यांस
वसविलें; १२ याचें कारण हेंच कीं त्यांनीं आपला
देव परमेश्वर याची वाणी मानिली नाहीं व त्याचा
करार मोडिला; परमेश्वराचा सेवक मोशे यानें विहित
केलेलें सर्व कांहीं त्यांनीं जुमानिलें नाहीं; ते तें ऐकतना
व त्याप्रमाणें वर्ततना.

१३ हिज्कीया राजाच्या कारकीर्दीच्या चौदाव्या
वर्षी अश्शूरचा राजा सन्हेरीब यानें यहूदाच्या सर्व
तटबंदी नगरांवर चढाई करून तीं घेतलीं. १४ यहूदाचा
राजा हिज्कीया यानें अश्शूरच्या राजाला लाखीश येथें
सांगून पाठविलें कीं माझ्या हातून अपराध झाला आहे,
आतां मजकडून परत जा; आपण मजवर जो बोजा
लादाल तो मी साहीन. यहूदाचा राजा हिज्कीया यानें
तीनशें किक्कार चांदी व तीस किक्कार सोनें खंडणी
द्यावी असें अश्शूरच्या राजानें ठरविलें. १५ परमे-
श्वराच्या मंदिरांत व राजवाड्याच्या भांडारांत जेवढी
चांदी मिळाली तेवढी हिज्कीयानें त्यास दिली.
१६ त्या प्रसंगीं हिज्कीयानें परमेश्वराच्या मंदिराचे
दरवाजे व दारबाह्या यांवर जी सोन्याची मढणी
केली होती ती काढून अश्शूरच्या राजास

१ निर्गम २५:३९ पाहा.

दिली. १७ एवढ्यावरहि अश्शूरच्या राजानें तर्तान,
रब-सारीस व रब-शाके यांस मोठ्या सैन्यानिशीं
लाखीशाहून यरुशलेमास हिज्कीयाकडे पाठविलें. ते
यरुशलेमास जाऊन परटाच्या शेताजवळच्या वरल्या
तळ्याच्या नळानजीक येऊन ठेपले. १८ त्यांनीं
राजास बोलावणें पाठविलें तेव्हां खानगी कारभारी
एल्याकीम बिन हिल्कीया, चिटणीस शेबना व
बखरनवीस यवाह बिन आसाफ हे त्याजकडे
गेले. १९ तेव्हां रब-शाके त्यांस म्हणाला,
हिज्कीयाला सांगा कीं राजाधिराज, अश्शूरचा राजा
म्हणतो, हा तुझा भरंवसा कसला ! २० तूं बोलून
दाखविलेला तुझा युद्धसंकल्प व युद्धबल ह्या केवळ
वायफळ गोष्टी आहेत. तूं माझ्याशीं फितूर झालास
तो कोणाच्या बळावर ? २१ पाहा, तो मिसर म्हणजे
चेचलेला बोरू, त्यावर तूं टेकतोस; त्यावर कोणी
टेकला तर तो त्याच्या हातांत शिरून बोचेल; जे कोणी
मिसरी राजा फारो याजवर टेकतात त्यांस तो असाच
आहे. २२ तूं मला म्हणशील, आम्ही आमचा देव
परमेश्वर याजवर भिस्त ठेवितों, तर ज्याचीं उच्चस्थानें
व वेदी काढून टाकून यहूदा व यरुशलेम यांस
हिज्कीया म्हणाला कीं या एका वेदीपुढें यरुशलेमांत भजन
करा, तोच नव्हे का तो देव ? २३ आतां माझा धनी
अश्शूरचा राजा याशीं सामना करण्यास उभा राहा;
तुला स्वार बसविण्याची ताकद असली तर तुला दोन
हजार घोडा देतों. २४ माझ्या धन्याच्या अगदीं
कनिष्ठ दर्जाच्या एका तरी सरदाराला तूं कसा पिटाळशील ?
म्हणूनच तूं रथ आणि स्वार मिळविण्याविषयीं मिसरावर
भिस्त ठेवितोस ना ? २५ मी या देशावर चाल करून
याचा नाश करण्यास आलों तों का परमेश्वराच्या
सांगण्यावांचून ? परमेश्वरानेंच मला सांगितलें कीं
या देशावर चढाई करून जा व याचा विध्वंस कर.
२६ मग एल्याकीम बिन हिल्कीया, शेबना व यवाह
यांनीं रब-शाके यास विनंति केली कीं आपल्या दासांशीं
अरामी भाषेंत बोला, ती आम्हांस समजते; कोटावरील
लोकांच्या कानीं पडेल म्हणून यहूदी भाषेंत आम्हांशीं
बोलूं नका. २७ रब-शाके त्यानें उत्तर केलें कीं माझ्या
धन्यानें केवळ तुझ्या धन्याशीं व तुजशीं हें बोलण्यास मला
पाठविलें काय ? जे तुम्हांबरोबर कोटावर बसले आहेत
त्यांनीं आपलें मलमूत्र भक्षण करावें म्हणून त्यांजकडेहि
पाठविलें नाहीं काय ? २८ मग रब-शाके पुढें होऊन
यहूदी भाषेंत मोठ्यानें म्हणाला, राजाधिराज, अश्शूरचा
राजा याचें म्हणणें ऐका: २९ राजा म्हणतो,
हिज्कीयास तुम्हांला भुरळ घालूं देऊं नका, त्याच्यानें
तुमचा माझ्या हातून बचाव व्हावयाचा नाहीं;
३० परमेश्वर आमचा बचाव करीलच करील, हें शहर
अश्शूरच्या राजाच्या हातीं जाणार नाहीं असें बोलून
हिज्कीया तुम्हांस परमेश्वरावर भिस्त ठेवण्यास न
लावो. ३१ हिज्कीयाचें ऐकूं नका, कारण अश्शूरचा
राजा म्हणतो, मजशीं सल्ला करा व मजकडे निघून या;
आणि तूर्त तुम्ही प्रत्येक जण आपआपल्या द्राक्षवेलाचें
फळ खा, तुम्ही प्रत्येक जण आपआपल्या अंजिरांचें फळ
खा व तुम्ही प्रत्येक जण आपआपल्या हौदांचें पाणी प्या;
३२ पुढें मी येऊन तुमच्या देशासारखा देश, धान्याचा
व द्राक्षारसाचा देश, अन्नाचा व द्राक्षींच्या मळ्यांचा
देश, जैतून तेलाचा व मधाचा देश यांत तुम्हांस
नेईन; म्हणजे तुम्ही जीवंत राहाल, मरणार नाहीं;
परमेश्वर आमचा बचाव करील असें बोलून हिज्कीया
तुमचें मन वळवूं पाहील तेव्हां त्याचें ऐकूं नका.
३३ राष्ट्रांच्या देवांपैकीं कोणीं आपला देश अश्शूरच्या
राजाच्या हातून सोडविला आहे ? ३४ हमाथ
व अर्पाद यांचे देव कोठें आहेत ? सफरवाईम,
हेना व इव्वा यांचे देव कोठें आहेत ? त्यांनीं
शोमरोन माझ्या हातून सोडविलें आहे काय ?
३५ या सर्व देशांच्या देवांपैकीं कोणी आपला देश
माझ्या हातून सोडविला ? तर परमेश्वर माझ्या हातून
यरुशलेम कसें सोडविणार ? ३६ लोक गप्प राहिले,
त्याजशीं एकहि शब्द बोलले नाहींत; कारण तुम्ही
त्याला उत्तर देऊं नका अशी राजाची त्यांस ताकीद
होती. ३७ मग खानगी कारभारी एल्याकीम बिन
हिल्कीया, चिटणीस शेबना व बखरनवीस यवाह

बिन आसाफ हे आपलीं वस्त्रें फाडून हिज्कीयाकडे
आले व त्याला त्यांनीं रब-शाके ह्याचें बोलणें कळविलें.

१९ १ हें ऐकून हिज्कीयानें आपलीं वस्त्रें
फाडिलीं व गोणताट नेसून तो परमेश्वराच्या
मंदिरांत गेला. २ तेव्हां खानगी कारभारी
एल्याकीम, चिटणीस शेबना व याजकांपैकीं वृद्ध लोक
यांस गोणताट नेसलेले असे आमोजाचा पुत्र यशया
संदेष्टा याच्याकडे त्यानें पाठविले. ३ ते जाऊन त्याला
म्हणाले, हिज्कीया असें म्हणतो कीं आजचा दिवस
क्लेश, शिक्षा व अपमान यांचा आहे, कारण मुलें
जन्मावयास आलीं पण प्रसवण्याची शक्ति नाहीं;
४ जीवंत देवाचा उपमर्द करण्यासाठीं अश्शूरच्या
राजानें रब-शाके याजबरोबर जो निरोप पाठविला त्याचे
शब्द आपला देव परमेश्वर कदाचित् ऐकेल, व आपला देव
परमेश्वर ते शब्द ऐकून त्याला शिक्षा करील, म्हणून
जें कांहीं शेष उरलें आहे त्याकरितां आपण रदबदली करा.
५ याप्रमाणें हिज्कीया राजाचे सेवक यशया याजकडे
आले. ६ तेव्हां यशया त्यांस म्हणाला, आपल्या
धन्याला असें सांगा, परमेश्वर म्हणतो, अश्शूरच्या
राजाच्या सेवकांनीं ज्या शब्दांनीं माझा उपमर्द केला
आहे ते शब्द तूं ऐकले आहेत; त्यांनीं तूं घाबरूं
नको. ७ पाहा, मी त्याच्या ठायीं अशी कांहीं प्रेरणा
करीन कीं तो कांहीं अफवा ऐकून आपल्या देशास
परत जाईल व त्याच्याच देशांत तो तरवारीनें पडेल
असें मी करीन.

८ नंतर रब-शाके परत गेला तेव्हां अश्शूरचा राजा
लिब्ना नगराशीं लढतांना त्याला आढळला; कारण
लाखीशाहून त्यानें तळ उठविला अशी त्याला खबर
लागली होती. ९ मग कुशाचा राजा तिऱ्हाका तुजशीं
लढावयास निघाला आहे असें कोणी बोलतांना त्यानें
ऐकलें; हें ऐकून त्यानें हिज्कीयाला जासुदांच्या
हातीं सांगून पाठविलें कीं १० तुम्ही हिज्कीया
राजाकडे जाऊन सांगा, ज्या तुझ्या देवावर तूं भिस्त
ठेवितोस तो, अश्शूरच्या राजाच्या हातीं यरुशलेम
लागणार नाहीं, असें बोलून तुला न फसवो.
११ अश्शूरच्या राजांनीं सर्व देशांचें काय केलें तें
पाहा; त्यांचा विध्वंस कसा केला हें तूं ऐकलें आहेच;
तर तूं सुटणार काय ? १२ गोजान, हारान, रेसफ व
तलस्सार येथें राहणारे एदेनी लोक यांचा माझ्या वाड-
वडिलांनीं विध्वंस केला, त्यांचा त्या राष्ट्रांच्या देवांनीं
बचाव केला काय ? १३ हमाथाचा राजा, अर्पादाचा
राजा, आणि सफरवाईम, हेना व इव्वा यांचे राजे हे
कोठें आहेत ? १४ हिज्कीयानें जासुदांच्या हातून हें
पत्र घेऊन वाचिलें; मग हिज्कीया परमेश्वराच्या मंदिरांत
गेला आणि तें त्यानें परमेश्वरापुढें उघडून ठेविलें.
१५ हिज्कीयानें परमेश्वराची प्रार्थना केली कीं हे
परमेश्वरा, इस्राएलाच्या देवा, करूबारूढ असलेल्या देवा,
तूंच कायतो पृथ्वीवरील सर्व राज्यांचा देव आहेस;
तूंच आकाश व पृथ्वी हीं निर्माण केलीं. १६ हे परमेश्वरा,
कान लावून ऐक; हे परमेश्वरा, तूं डोळे उघडून पाहा
आणि सन्हेरीबानें तुझा म्हणजे जीवंत देवाचा उपमर्द
करण्यासाठीं जो निरोप पाठविला आहे त्याचे शब्द ऐक;
१७ हे परमेश्वरा, खरोखर अश्शूरच्या राजांनीं सर्व
राष्ट्रें व त्यांच्या जमिनी ओसाड केल्या आहेत;
१८ त्यांचे देव त्यांनीं अग्नींत टाकिले आहेत; कारण ते
देव नव्हते, ते मनुष्याच्या हातानें घडलेले काष्ठ व
पाषाण होते म्हणून त्यांनीं त्यांचा नाश केला.
१९ आतां परमेश्वरा, आमच्या देवा, त्याच्या हातांतून
आम्हांला सोडीव, म्हणजे पृथ्वीवरील सर्व राष्ट्रें जाण-
तील कीं तूंच कायतो परमेश्वर देव आहेस.

२० तेव्हां आमोजाचा पुत्र यशया यानें हिज्कीयाला
सांगून पाठविलें कीं परमेश्वर इस्राएलाचा देव असें
म्हणतो, अश्शूरचा राजा सन्हेरीब यासंबंधानें तूं माझी
प्रार्थना केली ती मीं ऐकली आहे. २१ तर त्याच्या-
विषयीं परमेश्वर वचन बोलला आहे तें हें : सीयोनाची
कुमारी तुला तुच्छ लेखिते व तुझा उपहास करिते;
यरुशलेमाची कन्या, तुला पाठमोरें झालेलें पाहून, आपलें
मस्तक हालविते. २२ तूं कोणाची निंदा केली ? कोणाच्या
विरुद्ध दुर्भाषण केलें ? कोणाच्या विरुद्ध ताठ्यानें
बोललास ? कोणावर आपल्या भोवया चढविल्या ?

इस्राएलाच्या जो पवित्र त्यावर! २३ तूं आपल्या
जासुदांच्या द्वारें प्रभूची निंदा करून म्हणालास, मी
आपल्या बहुत रथांनिशीं पर्वतांच्या माथ्यावर, लबा-
नोनाच्या अगदीं मध्यापर्यंत चढून आलों आहें; मी
त्याचे उंच गंधसरू व निवडक देवदारु तोडीन; त्याच्या
अत्यंत दूरच्या उच्चस्थानीं त्यांच्या फळझाडांच्या राईंत
प्रवेश करीन. २४ मी खणून परस्थलांचें पाणी प्यालों;
माझ्या पायांच्या तळव्यांनीं मिसर देशाचे सर्व जल-
प्रवाह मी सुकवून टाकीन. २५ तुझ्या कानावर हें
आलें नाहीं काय कीं मीं पूर्वी प्राचीन काळीं योजिलें
असून आतां प्रत्ययास आणिलें कीं तटबंदी नगरांचा
विध्वंस करून त्यांचे ढीग करण्यांत यावे? २६ ह्याकरितां
त्यांतील रहिवासी बलहीन झाले, ते भयभीत व
फजीत झाले; शेतांतील हिरवें गवत, धाब्यावरचें
गवत, वाढ पुरी होण्यापूर्वी करपलेलें धान्य त्यांसारखे
ते झाले. २७ तुझें बसणेंउठणें, तुझें जाणेंयेणें व
तुझा मजवरला संताप मला ठाऊक आहे. २८ मज-
वरल्या तुझ्या संतापामुळें व माझ्या कानावर आलेल्या
तुझ्या उन्मत्तपणामुळें मी तुझ्या नाकांत वेसण
व तुझ्या तोंडांत लगाम घालून ज्या वाटेनें
तूं आलास तिनेंच तुला परत लावीन. २९ आतां
तुला हें चिन्ह देतों: यंदां तुम्ही आपोआप उगवलेलें
खाल; पुढल्या वर्षी त्याचा खोडवा फुटेल तो
खाल; तिसऱ्या वर्षी तुम्ही पेरा, कापा, द्राक्षांचे मळे
लावा व त्यांचें फळ खा. ३० यहूदा वंशांतील
निभावलेला शेष पुनः खालीं मूळ धरील आणि
वर फळ देईल. ३१ कारण यरुशलेमांतून शेष निघेल
व सीयोन डोंगरांतून निभावलेले निघतील; परमेश्वराची
आस्था हें सिद्धीस नेईल. ३२ ह्याकरितां अश्शूरच्या
राजाविषयीं परमेश्वर म्हणतो कीं तो या नगरांत प्रवेश
करणार नाहीं, त्यावर एकहि बाण सोडणार नाहीं; तो
ढाल घेऊन त्याशीं सामना करणार नाहीं आणि त्यावर
मोर्चा लावणार नाहीं. ३३ ज्या वाटेनें तो आला तिनेंच
तो परत जाईल; त्याचा ह्या नगरांत प्रवेश होणार
नाहीं असें परमेश्वर म्हणतो. ३४ मी आपल्याकरितां
व माझा सेवक दावीद याच्याकरितां या नगराचा
उद्धार होईल असें याचें संरक्षण करीन.

३५ त्या रात्रीं असें झालें कीं परमेश्वराच्या देव-
दूतानें जाऊन अश्शूरी गोटांतले एक लक्ष पंचायशीं
हजार लोक मारिले; पहाटेस लोक उठून पाहतात तों
सर्व प्रेतेंच प्रेतें! ३६ मग अश्शूरचा राजा सन्हेरीब
तळ उठवून माघारा चालता झाला आणि निनवेंत
जाऊन राहिला. ३७ तेथें तो आपला देव निस्रोख
याच्या देवळांत जाऊन पूजा करीत असतां अद्रम्मेलेक
व शरेसर यांनीं त्यास तरवारीनें वधिलें; आणि ते
अराराट देशांत पळून गेले; मग एसर-हद्दोन त्याच्या
जागीं राजा झाला.

२० १ त्या समयीं हिज्कीया आजारी पडून
मरावयास टेकला, तेव्हां आमोजाचा पुत्र यशया
संदेष्टा त्याजकडे येऊन त्याला म्हणाला,
परमेश्वर म्हणतो, आपल्या घराची निरवानिरव कर,
कारण आतां तूं मरणार, जगणार नाहींस. २ तेव्हां
त्यानें आपलें तोंड भिंतीकडे फिरवून परमेश्वराची
प्रार्थना केली; तो म्हणाला, ३ हे परमेश्वरा, मी
तुझ्यासमोर सत्यतेनें व सात्विक मनानें वागलों आहें
आणि तुझ्या दृष्टीनें जें योग्य तेंच करीत आलों आहें
ह्याचें स्मरण कर अशी तुला मी विनंति करितों; असें म्हणून
हिज्कीया मनस्वी रडला. ४ तेव्हां नगराच्या मधल्या
चौकांत यशया जाऊन पोहंचतो तों त्याला परमे-
श्वराचा संदेश आला तो हा: ५ परत जाऊन माझ्या
लोकांचा नायक हिज्कीया यास सांग, तुझा पूर्वज
दावीद याचा देव परमेश्वर म्हणतो, मीं तुझी प्रार्थना
ऐकली आहे, तुझे अश्रु पाहिले आहेत; मी तुला
बरें करितों. तूं आजपासून तिसऱ्या दिवशीं परमे-
श्वराच्या मंदिरीं जाशील. ६ मी तुझें आयुष्य पंधरा
वर्षांनीं वाढवितों; मी तुला व या नगराला अश्शूरच्या
राजाच्या हातांतून सोडवीन; माझ्याकरितां व माझा
सेवक दावीद याच्याकरितां मी या नगराचें संरक्षण
करीन. ७ यशयानें सांगितलें, अंजिराची एक चांदकी
आणा. ती त्यांनीं आणून गळवावर बांधिली व त्याला

गुण आला. ८ हिज्कीयानें यशयास विचारिलें कीं
तिसऱ्या दिवशीं परमेश्वर मला बरें करील व मी
परमेश्वराच्या मंदिरीं जाईन याची खूण काय ?
९ यशया म्हणाला, परमेश्वरानें जें सांगितलें तें तो
करीलच याविषयीं परमेश्वराकडून ही खूण आहे : शंकु-
यंत्रावरील छाया दहा अंश पुढें जावी कीं मागें यावी ?
१० हिज्कीयानें म्हटलें, छाया दहा अंश पुढें जावी
ही सोपी गोष्ट आहे; तर छाया दहा अंश मागें यावी.
११ यशया संदेष्ट्यानें परमेश्वराची प्रार्थना केली आणि
आहाजाच्या शंकुयंत्रावर छाया दहा अंश उतरली
होती तेवढी त्यानें मागें आणिली.

१२ त्या वेळेस बाबेलचा राजा बलदानाचा पुत्र
बरोदख-बलदान यानें हिज्कीयाला पत्र व नजराणा
पाठविला, कारण तो आजारी असल्याचें त्यानें ऐकलें
होतें. १३ तेव्हां हिज्कीयानें जासुदांचें ऐकून आपलें
सर्व भांडार त्यांस दाखविलें; आपलें रुपें, सोनें, सुगंधी
द्रव्यें, उत्तम तेल, सर्व शस्त्रागार व त्याच्या भांडारांत
होतेंनव्हतें तें सर्व त्यानें दाखविलें; हिज्कीयानें
दाखविलें नाहीं असें त्याच्या घरांत व राज्यांत कांहीं
नव्हतें. १४ मग यशया संदेष्ट्यानें हिज्कीया राजाकडे
येऊन विचारिलें, ते मनुष्य काय म्हणाले व ते कोठून
आले ? हिज्कीयानें उत्तर दिलें, ते दूर देशाहून
मजकडे आले. १५ मग त्यानें विचारिलें, त्यांनीं
तुझ्या घरांत काय काय पाहिलें ? हिज्कीया म्हणाला,
माझ्या घरांतलें सर्व कांहीं त्यांनीं पाहिलें; माझ्या
भांडागारांतलें मीं त्यांना दाखविलें नाहीं असें कांहींच नाहीं.
१६ तेव्हां यशया हिज्कीयाला म्हणाला, परमेश्वराचें
वचन ऐक : १७ पाहा, असे दिवस येत आहेत कीं
तुझ्या घरांत जें कांहीं आहे व तुझ्या वाडवडिलांनीं
जें आजवर सांठवून ठेविलें आहे तें सर्व बाबेलास
घेऊन जातील, कांहीं शिल्लक राहणार नाहीं, असें
परमेश्वर म्हणतो. १८ तुजपासून होणारे तुझ्या पोटचे
पुत्र यांस ते नेतील व ते बाबेलच्या राजवाड्यांत
खोजे होऊन राहतील. १९ तेव्हां हिज्कीया यशयाला
म्हणाला, आपण सांगितलेलें परमेश्वराचें वचन यथायोग्य
आहे. तो आणखी म्हणाला, माझ्या कारकीर्दींत तरी
शांतता व स्थिरता हीं राहणार ना ? २० हिज्कीयाचीं
बाकीचीं कृत्यें, त्याचा सर्व पराक्रम, त्यानें तळें व नळ
बांधून नगरांत पाणी आणिलें या सर्वांचें वर्णन यहूदांच्या
राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय ? २१ हिज्कीया
आपल्या पितरांजवळ जाऊन निजला व त्याच्या जागीं
त्याचा पुत्र मनश्शे राजा झाला.

२१ १ मनश्शे राज्य करूं लागला तेव्हां तो
बारा वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत पंचावन्न
वर्षें राज्य केलें; त्याच्या आईचें नांव हेफसीबा
असें होतें. २ इस्राएल लोकांपुढून परमेश्वरानें ज्या
राष्ट्रांस घालवून दिलें होतें त्यांच्या अमंगळ आचारां-
प्रमाणें परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें मनश्शानें केलें.
३ त्याचा बाप हिज्कीया यानें उच्चस्थानें विध्वस्त केलीं
होतीं तीं त्यानें पुन: बांधिलीं; इस्राएलाचा राजा
अहाब याच्याप्रमाणें बालमूर्तींसाठीं वेदी बांधून त्यानें
एक अशेरामूर्ति केली; त्याप्रमाणेंच तो नक्षत्र-
गणांची पूजा करीत असे. ४ परमेश्वरानें ज्या
आपल्या मंदिराविषयीं म्हटलें होतें कीं यरुशलेमांत
मी आपलें नाम ठेवीन त्यांत त्यानें वेद्या बांधिल्या.
५ परमेश्वराच्या मंदिराच्या दोन्ही अंगणांत त्यानें
नक्षत्रगणांसाठीं वेद्या बांधिल्या. ६ त्यानें आपल्या
पुत्राचा अग्नींत होम करून तो अर्पिला; तो शकुनमुहूर्त
पाळीत असे, जादूटोणा करीत असे आणि भूतवैद्य व
चेटकी यांजशीं संबंध ठेवीत असे; परमेश्वराच्या दृष्टीनें
वाईट असें पुष्कळ करून त्यानें त्यास संताप आणिला.
७ आपण केलेली अशेरामूर्ति त्यानें परमेश्वराच्या मंदिरांत
ठेविली; या मंदिराविषयीं दावीद व त्याचा पुत्र
शलमोन यांस परमेश्वर म्हणाला होता कीं हें मंदिर
आणि इस्राएलाच्या सर्व वंशांतून निवडून घेतलेलें
यरुशलेम यांत मी आपलें नाम निरंतर ठेवीन;
८ मीं त्यांस ज्या आज्ञा दिल्या होत्या आणि माझा
सेवक मोशे यानें त्यांस जें धर्मशास्त्र विहित केलें
होतें तें सर्व मान्य करून ते पाळतील तर जो देश
इस्राएल लोकांच्या पूर्वजांस दिला आहे तेथून ते

निघून चोहोंकडे भटकतील असें मी करणार नाहीं;
९ पण त्यांनीं ऐकलें नाहीं. मनश्शानें त्यांस एवढें
बहकविलें कीं इस्राएलादेखत परमेश्वरानें ज्या राष्ट्रांचा
संहार केला होता त्यांच्याहिपेक्षां ते अधिकच दुष्कर्म
करूं लागले. १० ह्याकरितां परमेश्वरानें आपले सेवक
जे संदेष्टे त्यांच्या द्वारें विदित केलें कीं ११ यहूदाचा
राजा मनश्शे यानें हीं अमंगळ कृत्यें केलीं आहेत;
पूर्वकाळच्या अमोरी लोकांपेक्षांहि अधिक दुष्कर्म केलें
आहे आणि आपण मूर्तींच्या नादीं लागून यहूदासहि
पाप करावयास लाविलें आहे; १२ म्हणून इस्राएलाचा देव
परमेश्वर म्हणतो, पाहा, मी यरुशलेम व यहूदा यांवर
एवढें अरिष्ट गुदरविणार आहें कीं ज्याच्या कानावर तें
जाईल त्याचे दोन्ही कान भणभणतील; १३ मीं शोम-
रोनावर लाविलेलें मापनसूत्र व अहाबाच्या घराण्याला
लाविलेला ओळंबा हीं यरुशलेमाला लावीन; थाळी
जशी घासूनपुसून व उलथीपालथी करून ठेवितात
तसेंच मी यरुशलेमाचें करीन. १४ शेष राहिलेल्या
माझ्या वतनरूप लोकांचा मी त्याग करीन; त्यांस
शत्रूंच्या हातीं देईन; ते आपल्या सर्व शत्रूंचें भक्ष्य
व लूट होतील; १५ कारण त्यांचे पूर्वज मिसर देशांतून
बाहेर निघाले तेव्हांपासून आजपर्यंत माझ्या दृष्टीनें
जें वाईट तें करून त्यांनीं मला संताप आणिला आहे.
१६ मनश्शानें परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें
करून यहूदास पाप करावयास लाविलें एवढेंच नव्हे,
तर त्यानें निर्दोषी जनांचा मनस्वी संहार केला, एका
टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत यरुशलेम रक्तमय केलें.
१७ मनश्शाचीं बाकीचीं कृत्यें, त्यानें जें कांहीं केलें तें
सर्व आणि त्यानें केलेलें पापकर्म या सर्वांचें वर्णन
यहूदाच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय ?
१८ मनश्शे आपल्या पितरांजवळ जाऊन निजला;
त्याच्या वाड्याच्या बागेंत म्हणजे अर्थात् उज्जाच्या
बागेंत त्यास मूठमाती देण्यांत आली आणि त्याच्या
जागीं त्याचा पुत्र आमोन हा राजा झाला.

१९ आमोन राज्य करूं लागला तेव्हां तो बावीस
वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत दोन वर्षें राज्य केलें;
त्याच्या आईचें नांव मशुल्लेमेथ असें होतें; ती यटबा
येथला हारूस याची कन्या. २० त्यानें आपला बाप
मनश्शे याच्या करणीप्रमाणें परमेश्वराच्या दृष्टीनें जें
वाईट तें केलें. २१ त्याचा बाप ज्या मार्गानें चालला
त्यानें तो चालला; ज्या मूर्तींची त्याच्या बापानें
पूजा केली त्यांची पूजा त्यानेंहि केली. २२ आपल्या
वाडवडिलांचा देव परमेश्वर यास त्यानें सोडिलें; तो
परमेश्वराच्या मार्गानें चालला नाहीं. २३ आमोनाच्या
चाकरांनीं त्याच्याशीं फितुरी केली; त्यांनीं राजास
त्याच्याच वाड्यांत जिवें मारिलें; २४ पण ज्यांनीं
आमोन राजाशीं फितुरी केली त्या सर्वांस देशच्या
लोकांनीं जिवें मारिलें; त्यांनीं त्याच्या जागीं त्याचा
पुत्र योशीया यास राजा केलें. २५ आमोनाचीं
बाकीचीं कृत्यें यहूदाच्या राजांच्या बखरींत वर्णिलीं
आहेत, नाहींत काय ? २६ आमोनास उज्जाच्या बागेंत
त्यानेंच बांधिलेल्या थडग्यांत मूठमाती देण्यांत आली;
त्याच्या जागीं त्याचा पुत्र योशीया हा राजा झाला.

२२ १ योशीया राज्य करूं लागला तेव्हां तो
आठ वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत एकतीस
वर्षें राज्य केलें; त्याच्या आईचें नांव यदीदा.
ती बसकथ एथला अदाया याची कन्या. २ परमेश्वराच्या
दृष्टीनें जें बरें तें त्यानें केलें; ज्या मार्गानें त्याचा
पूर्वज दावीद चालला त्यानेंच तोहि चालला; उजवी-
डावीकडे वळला नाहीं.

३ आपल्या कारकीर्दीच्या अठराव्या वर्षीं योशीया
राजानें आपला चिटणीस शाफान बिन असल्या बिन मशु-
ल्लाम यास परमेश्वराच्या मंदिरीं पाठविलें; ४ त्यानें त्यास
सांगितलें, जा, मुख्य याजक हिल्कीया यास सांग कीं
जो पैका परमेश्वराच्या मंदिरीं आलेला आहे व द्वारपाळांनीं
लोकांपासून जमविला आहे त्याचा हिशोब करा.
५ मग तो परमेश्वराच्या मंदिराची देखरेख करणाऱ्या
कामदारांस द्या; त्यांनीं तो पैका घेऊन मंदिराची मोड-
तोड झाली असेल ती दुरुस्त करण्यासाठीं कारा-
गिरांस द्यावा. ६ सुतार, बांधकाम करणारे व गवंडी
यांस तो द्यावा; तसेंच मंदिराची दुरुस्ती करण्यासाठीं

इमारती लाकूड व घडींव चिरे विकत घ्यावे.
७ ज्यांच्या हातीं तो पैका दिला होता, त्यांच्याकडे
कोणीं हिशोब मागितला नाहीं, कारण ते आपलें काम
सचोटीनें करीत. ८ मुख्य याजक हिल्कीया यानें शाफान
चिटणीस यास सांगितलें कीं परमेश्वराच्या मंदिरांत
मला नियमशास्त्राचा ग्रंथ सांपडला आहे. हिल्कीयानें
तो ग्रंथ शाफानास दिला व त्यानें तो वाचिला.
९ शाफान चिटणिसानें राजाकडे परत येऊन त्यास
असें कळविलें कीं आपल्या सेवकांस मंदिरांत जो पैका
मिळाला तो सर्व त्यांनीं थैल्यांत भरून परमेश्वराच्या
मंदिराची देखरेख करणाऱ्या कामदारांच्या हवालीं
केला आहे. १० शाफान चिटणिसानें राजास आणखी
असें सांगितलें कीं हिल्कीया याजकानें मला एक ग्रंथ
दिला आहे. शाफानानें तो राजास वाचून दाखविला.
११ त्या नियमशास्त्राच्या ग्रंथांतलीं वचनें राजानें
ऐकलीं तेव्हां त्यानें आपलीं वस्त्रें फाडिलीं. १२ मग
त्यानें हिल्कीया याजक, अहीकाम बिन शाफान,
अखबोर बिन मिखाया, शाफान चिटणीस व राजसेवक
असाया यांस आज्ञा केली कीं, १३ हा जो ग्रंथ
सांपडला आहे त्यांतील मजकुरासंबंधानें तुम्हीं जाऊन
माझ्यातर्फे, प्रजेच्यातर्फे व सर्व यहूदाच्यातर्फे,
परमेश्वरास प्रश्न करा; आमच्या वाडवडिलांनीं या
ग्रंथांतलीं वचनें ऐकलीं नाहींत, व आमच्यासाठीं जें
यांत लिहिलें आहे तें पाळिलें नाहीं म्हणून परमेश्वराचा
आम्हांवर मोठा क्रोध भडकला आहे. १४ तेव्हां
हिल्कीया याजक, अहीकाम, अखबोर, शाफान, व
असाया हे हुल्दा संदेष्ट्रीकडे गेले व तिच्याशीं त्यांनीं भाषण
केलें. ती शल्लूम बिन तिकवा बिन हरहस नांवाचा जामदार
याची स्त्री असून ती या वेळीं यरुशलेमाच्या दुसऱ्या
पेठेंत राहत होती. १५ ती त्यांस म्हणाली, इस्राएलाचा
देव परमेश्वर म्हणतो, ज्या पुरुषानें तुम्हांस मजकडे
पाठविलें त्यास जाऊन सांगा: १६ परमेश्वर म्हणतो,
पाहा, यहूदाच्या राजानें जो ग्रंथ वाचिला त्यांतील सर्व
वचनांप्रमाणें या स्थानावर व येथील रहिवाश्यांवर मी
गहजब आणणार; १७ कारण या लोकांनीं मला
सोडून देऊन अन्य देवांपुढें धूप जाळिला आहे आणि
आपल्या हातांनीं घडलेल्या सर्व वस्तूंमुळें मला संतप्त
केलें आहे, म्हणून या स्थानावर माझा क्रोध भडकेल,
तो शांत व्हावयाचा नाहीं. १८ तथापि ज्यानें तुम्हांस
परमेश्वराला प्रश्न करावयास पाठविलें त्या यहूदाच्या
राजास जाऊन सांगा: इस्राएलाचा देव परमेश्वर
म्हणतो, १९ तूं हीं वचनें ऐकून दीन झालास, आणि
हें स्थान व यांतील रहिवासीहि विस्मयाला व शापाला
विषय होतील असें जें मी बोललों आहें तें ऐकून
परमेश्वरापुढें नम्र झालास, तूं आपलीं वस्त्रें फाडिलीं व
माझ्यासमोर रडलास यामुळें मीं तुझी विनंति ऐकली
आहे, असें परमेश्वर म्हणतो. २० तर पाहा,
मी असें करीन कीं तुला तुझ्या पितरांशीं मिळवीन;
तुला तुझ्या कबरेंत सुरक्षितपणें पोंचवितील; जो
गहजब मी या स्थलावर आणणार आहें तो तू आपल्या
डोळ्यांनीं पाहणार नाहींस. त्यांनीं परत येऊन राजाला
हें कळविलें.

२३

१ मग राजानें यहूदांतील व यरुशलेमांतील
सर्व वडील जनांस बोलावणें पाठवून जमा केलें.
२ यहूदा येथील सर्व लोक, सर्व यरुशलेमांतले
रहिवासी, याजक, संदेष्टे, सर्व आबालवृद्ध यांस बरोबर
घेऊन राजा परमेश्वराच्या मंदिरीं गेला; परमेश्वराच्या
मंदिरांत सांपडलेल्या कराराच्या ग्रंथांतील सर्व वचनें
त्यानें लोकांस ऐकूं येतील अशीं वाचून दाखविलीं.
३ मग राजानें पीठावर उभें राहून परमेश्वरासमोर
असा करार केला कीं मी परमेश्वराचें अनुसरण करीन
व त्याच्या आज्ञा, निर्बंध व नियम जिवेंभावें पाळीन,
या ग्रंथांत लिहिलेलीं सर्व वचनें पाळीन; तेव्हां
सर्व लोकांनीं तो करार मान्य केला. ४ मग राजानें
हिल्कीया मुख्य याजक, दुसऱ्या प्रतीचे याजक आणि
द्वारपाळ यांस आज्ञा केली कीं बालमूर्ति, अशेरामूर्ति
व नक्षत्रगण यांच्याकरितां जीं पात्रें केलीं आहेत
तीं सर्व परमेश्वराच्या मंदिरांतून बाहेर काढा. त्यानें तीं
सर्व पात्रें यरुशलेमाच्या बाहेर किद्रोनच्या मैदानांत
जाळून त्यांची राख बेथेल येथें पाठविली. ५ जितके

पुजारी यहूदाच्या राजांनीं यहूदी नगराच्या उच्चस्थानीं
व यरुशलेमाच्या आसपासच्या उच्चस्थानीं धूप जाळण्या-
साठीं नेमिले होते ते आणि जे कोणी बाल,
सूर्य, चंद्र, राशिचक्र व नक्षत्रगण यांस धूप जाळीत
होते तीं सर्व राजानें काढून टाकिलीं. ६ त्यानें
परमेश्वराच्या मंदिरांतून अशेरामूर्ति बाहेर काढिली
व यरुशलेमाबाहेर किद्रोन ओहोळाजवळ नेऊन
जाळून टाकिली, पायांनीं तुडवून तिचें चूर्ण केलें व
तें साधारण लोकांच्या कबरांवर फेकून दिलें;
७ त्याप्रमाणेंच परमेश्वराच्या मंदिरास लागून पुरुषगमन
करणाऱ्यांचीं घरें होतीं तीं त्यानें मोडून टाकिलीं;
त्यांत स्त्रिया अशेरामूर्तीप्रीत्यर्थ पडदे विणीत असत.
८ त्यानें यहूदाच्या सर्व नगरांतील याजकांस बोलावणें
पाठविलें; गेबापासून बैरशेबापर्यंत असलेल्या ज्या
उच्चस्थानीं ते याजक धूप जाळीत असत तीं त्यानें भ्रष्ट
केलीं, आणि नगराधिकारी यहोशवा याच्या नगराच्या
वेशींत डाव्या हाताला उच्चस्थानें होतीं तीं सर्व मोडून
टाकिलीं. ९ तरी पण उच्चस्थानांचे याजक यरुश-
लेमांतील परमेश्वराच्या वेदीजवळ आले नाहींत: ते
आपल्या भाऊबंदांमध्यें राहून बेखमीर भाकरी खात
असत. १० नंतर, कोणीं आपला पुत्र अथवा कन्या
यांचा अग्नींत होम करून त्यास मोलखास अर्पूं नये
म्हणून हिन्नोमपुत्रांच्या खोऱ्यांतील तोफेत त्यानें भ्रष्ट
करून टाकिलें. ११ जे घोडे यहूदाच्या राजांनीं
सूर्यास वाहून परमेश्वराच्या मंदिराच्या द्वारीं नथन-मेलेक
नांवाच्या खोजाच्या बाहेरल्या बाजूच्या कोठडीपाशीं ठेविले
होते, ते त्यानें काढून टाकिले आणि सूर्याचे रथ अग्नीनें
जाळून टाकिले. १२ आहाजाच्या माडीच्या धाब्यावर ज्या
वेद्या यहूदाच्या राजांनीं केल्या होत्या आणि मनश्शानें
परमेश्वराच्या मंदिराच्या दोहों अंगणांत ज्या वेद्या
केल्या होत्या त्या राजानें मोडून फोडून टाकिल्या आणि
त्यांची धूळमाती त्यानें किद्रोन ओहोळांत फेकून दिली;
१३ आणि इस्राएलाचा राजा शलमोन यानें यरुश-
लेमाच्या पूर्वेस आणि विध्वंसगिरी नांवाच्या पहाडाच्या
दक्षिणेस सिदोन्यांची अमंगळ देवी अष्टोरेथ, मवाबाचें
अमंगळ दैवत कमोश व अम्मोन्यांचें अमंगळ दैवत
मिलकोम यांच्याप्रीत्यर्थ जीं उच्चस्थानें बांधिलीं
होतीं तीं राजानें भ्रष्ट केलीं. १४ त्यानें तेथील मूर्ति-
स्तंभ मोडून त्यांचे तुकडे केले, तेथील अशेरामूर्ति
फोडून टाकिल्या व त्यांच्या ठिकाणीं माणसांचीं हाडें
भरून ठेविलीं. १५ मग बेथेल येथें जी वेदी होती
आणि जें उच्चस्थान इस्राएलांकडून पाप करविणारा
नबाटपुत्र यराबाम यानें बांधिलें होतें, ती वेदी व तें
उच्चस्थान त्यानें पाडून टाकिलें; तें उच्चस्थान जाळून
टाकिलें, त्याचा भुगा केला व अशेरामूर्ति जाळून
टाकिल्या. १६ योशीयानें वळून पाहिलें तों डोंगरा-
वरील कबरा त्याच्या दृष्टीस पडल्या; त्यानें माणसें
पाठवून कबरांतून हाडें बाहेर काढून आणविलीं आणि
तीं त्या वेदीवर जाळून ती भ्रष्ट केली. या गोष्टी
विदित करणाऱ्या देवाच्या माणसानें देवाचें जें वचन
कळविलें होतें तदनुसार हें घडलें. १७ मग त्यानें
विचारिलें, माझ्यासमोर हें जें स्मारक दिसत आहे तें
कोणाचें? नगरांतील लोकांनीं त्यास सांगितलें कीं तूं
या बेथेलच्या वेदीचें जें कांहीं केलें त्याविषयीं ज्या
देवाच्या माणसानें यहूदांतून येऊन विदित केलें होतें
त्याचें हें थडगें. १८ तो म्हणाला, त्याच्या वाटेस जाऊं
नको, त्याच्या अस्थि कोणी काढूं नका. त्यांनीं त्याच्या
अस्थि शोमरोनाहून आलेल्या संदेष्ट्याच्या अस्थींबरोबर
तशाच राहूं दिल्या. १९ जेवढीं उच्चस्थानें शोमरोनांतील
नगरांत बांधून इस्राएलाच्या राजांनीं परमेश्वरास
संताप आणिला होता ती सर्व योशीयानें काढून टाकिलीं;
त्यानें बेथेल येथें केलें होतें त्याप्रमाणेंच त्यांचें केलें.
२० तेथल्या उच्चस्थानांचे याजक होते तितक्यांस
त्यानें त्या वेद्यांवर बलि दिले व त्यांच्यावर माणसांचीं
हाडें जाळिलीं; मग तो यरुशलेमास परत गेला.

२१ नंतर राजानें सर्व लोकांस आज्ञा दिली कीं
या कराराच्या ग्रंथांत लिहिलें आहे त्याप्रमाणें तुम्ही
आपला देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ वल्हांडण सण
पाळा. २२ असा वल्हांडण सण इस्राएलाचे शास्ते
शासन करीत होते त्यांच्या काळापासून व इस्राएलाचे

राजे व यहूदाचे राजे यांच्या कारकीर्दीत कधीं
पाळण्यांत आला नव्हता; २३ योशीया राजाच्या कार-
कीर्दीच्या अठराव्या वर्षी परमेश्वराप्रीत्यर्थ यरुशलेमांत
वल्हांडण सण पाळण्यांत आला. २४ याखेरीज हिल्कीया
याजक यास परमेश्वराच्या मंदिरांत जो ग्रंथ सांपडला
होता त्यांतील नियमशास्त्राच्या वचनाप्रमाणें वर्तावें
म्हणून यहूदा देशांत व यरुशलेमांत दैवज्ञ व चेटकी,
आणि गृहदेवता, मूर्ति आदिकरून ज्या अमंगळ वस्तु
योशीयाच्या नजरेस पडल्या त्या त्यानें काढून टाकिल्या.
२५ मोशाच्या नियमशास्त्रानुसार आपल्या साऱ्या
मनानें, आपल्या साऱ्या जिवानें व आपल्या साऱ्या
बलानें परमेश्वरभजनीं लागणारा योशीयासारखा
राजा पूर्वी होऊन गेला नाहीं व पुढेंहि झाला नाहीं.
२६ एवढें त्यानें केलें तरी देखील मनश्शानें जीं संताप-
जनक कृत्यें करून परमेश्वरास संतप्त केलें होतें
त्यामुळें परमेश्वराचा जो महाक्रोध यहूदावर भडकला
होता तो शमला नाहीं. २७ परमेश्वर म्हणाला, मीं
इस्राएलास जसें आपल्या नजरेपुढून दूर केलें तसेंच
यहूदासहि दूर करीन; हें यरुशलेम नगर मीं निवडिलें
होतें व ह्या मंदिरांत माझ्या नामाचा निवास होईल
असें मी म्हणालों होतों, त्यांचाहि मी त्याग करीन.
२८ योशीयाचीं बाकीचीं कृत्यें व त्यानें जें कांहीं केलें
त्या सर्वांचें वर्णन यहूदाच्या राजांच्या बखरींत केलें
आहे, नाहीं काय? २९ त्याच्या कारकीर्दीच्या अखेरीस
मिसर देशाचा राजा फारो-नखो हा अश्शूरच्या राजावर
चढाई करून फरात महानदापर्यंत गेला असतां
योशीया राजा त्याच्यावर चालून गेला; योशीया
मगिद्दो येथें त्याच्यासमोर आला तेव्हां त्याला त्यानें
ठार केलें. ३० त्याच्या चाकरांनीं त्याचें प्रेत रथावर
घालून मगिद्दो येथून यरुशलेमास पोहंचविलें; त्यानें
स्वतः केलेल्या थडग्यांत त्यांनीं त्यास मूठमाती दिली. मग
देशांतील लोकांनीं योशीयाचा पुत्र यहोआहाज यास
अभिषेक करून त्याच्या बापाच्या जागीं राजा केलें.

३१ यहोआहाज राज्य करूं लागला तेव्हां तेवीस
वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत तीन महिने राज्य
केलें; त्याच्या आईचें नांव हमूटल; ही लिब्नाकर
यिर्मया याची कन्या. ३२ त्याच्या वाडवडिलांनीं केलें
होतें त्याप्रमाणें परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें
केलें. ३३ यरुशलेमांत त्यास राज्य करितां येऊं नये
म्हणून फारो-नखो यानें हमाथ देशांतलें रिब्ला येथें
त्यास बेड्या घालून ठेविलें आणि त्याच्या देशावर
शंभर किक्कार चांदी व एक किक्कार सोनें एवढी खंडणी
बसविली. ३४ मग फारो-नखो यानें योशीयाचा पुत्र
एल्याकीम यास त्याच्या बापाच्या जागीं राजा केलें.
त्यानें त्याचें नांव बदलून यहोयाकीम असें ठेविलें;
यहोआहाज मिसर देशास गेल्यावर मरण पावला.
३५ यहोयाकीम यानें फारोला सोनें व रुपें दिलें; पण
हा पैका फारोच्या हुकमाप्रमाणें देण्यासाठीं त्याला
देशावर कर बसवावा लागला; देशांतल्या सर्व लोकांवर
कर बसवून फारो-नखो यास देण्यासाठीं त्यानें प्रत्येका-
कडून सोनें व रुपें वसूल केलें.

३६ यहोयाकीम राज्य करूं लागला तेव्हां तो पंच-
वीस वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत अकरा वर्षें राज्य
केलें; त्याच्या आईचें नांव जबूदा; ती रुमा येथला
पदाया याची कन्या. ३७ त्यानें आपल्या पूर्वजांच्या
सर्व करणीप्रमाणें परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें
केलें. १ यहोयाकीमाच्या कारकीर्दीत बाबेलचा
२४ राजा नबुखद्नेस्सर यानें स्वारी केली; यहोया-
कीम तीन वर्षें त्याचा अंकित होऊन राहिला; मग
त्यानें त्याजवर उलटून बंड केलें. २ परमेश्वरानें आपले
सेवक संदेष्टे यांच्याद्वारें सांगितलेल्या वचनाप्रमाणें
यहूदाचा नाश करावा म्हणून त्याच्यावर खास्दी,
अरामी, मवाबी व अम्मोनी यांच्या टोळ्या पाठविल्या.
३ यहूदी लोकांस आपल्यासमोरून घालवावें म्हणून
निःसंशय हें सर्व परमेश्वराच्या आज्ञेनें यहूदावर आलें;
मनश्शानें केलेल्या सर्व पापकर्मांमुळें व त्यानें निरपराध
जनांचा रक्तपात केल्यामुळें असें झालें. ४ त्यानें यरुशलेम
निरपराध जनांच्या रक्तानें भरून टाकिलें म्हणून
परमेश्वर क्षमा करीना. ५ यहोयाकीमाच्या बाकीच्या

१ निर्गम २५:३९ पाहा.

कृत्यांचें व त्यानें जें कांहीं केलें त्या सर्वांचें वर्णन
यहूदाच्या राजांच्या बखरींत केलें आहे, नाहीं काय?
६ यहोयाकीम आपल्या पितरांजवळ जाऊन निजला व
त्याच्या जागीं त्याचा पुत्र यहोयाखीन राजा झाला.
७ मिसर देशाचा राजा पुनः कधीं आपला देश सोडून
बाहेर पडला नाहीं, कारण मिसर देशाच्या नाल्यापासून
महानद फरात येथवर जो सर्व मुलूख मिसरी राजाचा
होता तो बाबेलच्या राजानें काबीज केला होता.

८ यहोयाखीन राज्य करूं लागला तेव्हां तो अठरा
वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत तीन महिने राज्य
केलें; त्याच्या आईचें नांव नेहूष्टा; ती यरुशलेमाच्या
एलनाथानची कन्या. ९ त्यानें आपल्या बापाच्या
करणीप्रमाणें परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें केलें
१० त्याच्या कारकीर्दीत बाबेलचा राजा नबुखद्नेस्सर
याच्या सेवकांनीं यरुशलेमावर स्वारी करून नगरास
वेढा दिला. ११ बाबेलचा राजा नबुखद्नेस्सर याच्या
सेवकांनीं नगरास वेढा घातला असतां तो स्वतः तेथें
आला; १२ तेव्हां यहूदाचा राजा यहोयाखीन आपली
आई, सेवक, सरदार व खोजे यांस बरोबर घेऊन
बाबेलच्या राजाकडे गेला; बाबेलच्या राजानें आपल्या
कारकीर्दीच्या आठव्या वर्षी त्यास पकडिलें. १३ मग
त्यानें परमेश्वराच्या मंदिरांत व राजवाड्यांत ठेविलेलें
सारें धन लुटून नेलें; शलमोन राजानें जीं सोन्याचीं
पात्रें करून परमेश्वराच्या मंदिरांत ठेविलीं होतीं तीं सर्व
फोडून त्यांचे त्यानें तुकडे केले; तसें होणार हें परमेश्वरानें
सांगितलेंच होतें. १४ त्यानें अवघें यरुशलेम म्हणजे
सर्व सरदार, सर्व पराक्रमी वीर मिळून एकंदर दहा
हजार लोक आणि सर्व कारागीर व लोहार यांस कैद
करून नेलें; देशांत अगदीं कंगाल लोकांखेरीज कोणी
राहिले नाहींत. १५ त्यानें यहोयाखीनास बाबेलास नेलें;
राजाची आई, राजाच्या स्त्रिया, खोजे व देशांतील
मोठमोठे लोक यांस त्यानें कैद करून यरुशलेमाहून
बाबेलास नेलें. १६ एकंदर सात हजार धट्टेकट्टे लोक
आणि एक हजार कारागीर व लोहार बाबेलच्या राजानें
कैद करून बाबेलास नेले; हे सारे युद्धास लायक व
बळकट होते. १७ बाबेलच्या राजानें त्याच्या जागीं
त्याचा चुलता मत्तन्या यास राजा केलें; त्यानें त्याचें
नांव बदलून सिद्कीया असें ठेविलें.

१८ सिद्कीया राज्य करूं लागला तेव्हां एकवीस
वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत अकरा वर्षे राज्य
केलें. त्याच्या आईचें नांव हमूटल; ती लिब्ना
येथील यिर्मया याची कन्या. १९ यहोयाकीमाप्रमाणें
त्याचें वर्तन असून परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें
त्यानें केलें. २० परमेश्वराच्या कोपामुळें यरुशलेम व
यहूदा यांची अशी दशा झाली कीं शेवटीं त्यानें
त्यांस आपल्या दृष्टीआड केलें. सिद्कीयानें बाबेलच्या
राजाविरुद्ध बंड केलें.

२५ १ त्याच्या कारकीर्दीच्या
नवव्या वर्षाच्या दहाव्या महिन्यांतील दशमीस
बाबेलचा राजा नबुखद्नेस्सर आपली सर्व सेना
घेऊन यरुशलेमावर चढाई करून आला; त्यानें
त्याच्यासमोर तळ देऊन सभोवार मेढेकोट उभारिले.
२ सिद्कीया राजाच्या कारकीर्दीच्या अकराव्या
वर्षापर्यंत नगरास वेढा पडला होता. ३ चौथ्या
महिन्याच्या नवमीपासून नगरांत एवढी महागाई
झाली कीं देशाच्या लोकांस कांहीं खावयास मिळेना.
४ मग नगराच्या तटास एक खिंड पाडण्यांत आली;
दोहों तटांच्यामध्यें जी वेस राजाच्या बागेपाशीं होती
त्या वाटेनें सर्व योद्धे रातोरात पळून गेले; नगरास
खास्द्यांचा वेढा पडलाच होता; इकडे राजानें अराबाचा
रस्ता धरिला. ५ तेव्हां खास्दी सेनेनें राजाचा पाठलाग
करून त्यास यरीहोच्या मैदानांत गांठिलें व त्याच्या
सर्व सैन्याची दाणादाण केली. ६ ते राजास पकडून
रिब्ला येथें बाबेलच्या राजाकडे घेऊन गेले; त्यांनीं
त्याची शिक्षा ठरविली. ७ त्यांनीं सिद्कीयाच्या पुत्रांस
त्याच्या डोळ्यांदेखत वधिलें आणि सिद्कीयाचे डोळे
फोडून त्यास बेड्यांनीं जखडून बाबेलास नेलें.

८ बाबेलचा राजा नबुखद्नेस्सर याच्या कारकीर्दीच्या
एकोणिसाव्या वर्षी पांचव्या महिन्याच्या सप्तमीस
नबुजरदान यरुशलेमास आला; हा बाबेलच्या राजाचा
सेवक असून गारद्यांचा नायक होता; ९ त्यानें परमे-

श्वराचें मंदिर व राजवाडा हीं जाळून टाकिलीं, तशींच
यरुशलेमांतलीं सगळीं मोठमोठीं घरें जाळून टाकिलीं.
१० गारद्यांच्या सरदारांबरोबर असलेल्या खास्द्यांच्या
सर्व सैन्यानें यरुशलेमाभोंवतालचे सर्व तट पाडून टाकिले.
११ शहरांत राहिलेले अवशिष्ट लोक, बाबेलच्या राजा-
कडे फितून गेलेले लोक आणि उरलेले साधारण लोक
यांस गारद्यांचा नायक नबुजरदान यानें कैद करून नेलें.
१२ देशांतले जे लोक अतिशयित कंगाल होते त्यांस
गारद्यांच्या सरदारानें द्राक्षांच्या मळ्यांची व शेताची मशा-
गत करण्यास मागें ठेविलें. १३ परमेश्वराच्या मंदिरांत
असलेले पितळेचे खांब, मंदिरांतला पितळी गंगाळ-
सागर व त्याच्या बैठकी हीं खास्दी लोकांनीं फोडून-
तोडून त्यांचें पितळ बाबेलास नेलें. १४ पात्रें, फावडीं,
चिमटे, धूपदानें आणि सेवेचीं सर्व पितळेचीं उपकरणें
त्यांनीं नेलीं. १५ अग्निपात्रें, कटोरे वगैरे जेवढीं
सोन्याचीं होतीं त्यांचें सोनें व जीं चांदीचीं होतीं
त्यांची चांदी गारद्यांच्या सरदारानें नेली. १६ दोन
खांब, गंगाळसागर व त्याच्या बैठकी हीं शलमोनानें
परमेश्वराच्या मंदिरासाठीं केलीं होतीं, या सर्व
उपकरणांचें पितळ अपरिमित होतें. १७ एका खांबाची
उंची अठरा हात असून त्यावर पितळेचा कळस होता;
त्या कळसाची उंची तीन हात होती; त्या कळसाच्या
सभोंवार पितळेची जाळी व डाळिंबें केलीं होतीं; दुसऱ्या
खांबालाहि असेंच जाळीचें काम होतें. १८ गारद्यांच्या
सरदारानें मुख्य याजक सराया, दुय्यम याजक सफन्या
व तीन द्वारपाळ यांस पकडून नेलें. १९ योद्ध्यांवर नेमि-
लेल्या एका खोजास त्यानें नगरांतून पकडून नेलें, राजाच्या
हुजुरास असणारे पांच पुरुष त्याला शहरांत आढळले
त्यांसहि त्यानें नेलें, त्याप्रमाणेंच लोकांची सैन्यांत भरती
करणारा सेनापतीचा चिटणीस आणि नगरांत सांपडलेल्या
लोकांपैकीं साठ असामी ह्यांस त्यानें नेलें. २० गारद्यांचा
सरदार नबुजरदान यानें त्यांस पकडून रिब्ला येथें
बाबेलच्या राजाकडे नेलें. २१ बाबेलच्या राजानें त्यांस
हमाथ देशांतील रिब्ला येथें मार देऊन ठार केलें. या
प्रकारें यहूदी लोकांस त्यांच्या देशांतून कैद करून नेलें.
२२ यहूदा देशांतील जे लोक बाबेलच्या राजा नबुखद्-
नेस्सर यानें राहूं दिले होते त्यांजवर त्यानें गदल्या
बिन अहीकाम बिन शाफान यास सुभेदार नेमिलें.

२३ बाबेलच्या राजानें गदल्यास सुभेदार नेमिलें
हें सेनानायकांनीं व त्यांच्या लोकांनीं ऐकलें,
तेव्हां इस्माएल बिन नथन्या, योहानान बिन कारेह,
सराया बिन तन्हुमेथ, नटोफाथी आणि याजन्या बिन
माकाथी व त्यांचे सर्व पुरुष मिस्पा येथें गदल्या
याजकडे आले. २४ तेव्हां गदल्या आणभाक करून
त्यांस व त्यांच्या माणसांस म्हणाला, खास्द्यांच्या अधि-
काऱ्यांची भीति धरूं नका; देशांत राहून बाबेलच्या
राजाचे अंकित व्हा म्हणजे तुमचें बरें होईल.
२५ सातव्या महिन्यांत राजवंशांतला इस्माएल बिन
नथन्या बिन अलीशामा यानें दहा माणसांसह येऊन
गदल्यास ठार मारिलें; तसेंच मिस्पा येथें त्याज-
बरोबर असलेले यहूदी व खास्दी यांसहि त्यानें
ठार मारिलें. २६ तेव्हां लहानथोर सर्व लोक आणि
सेनांचे नायक मिसर देशास निघून गेले; त्यांस
खास्द्यांचा धाक पडला होता.

२७ यहूदाचा राजा यहोयाखीन याच्या बंदिवासाच्या
सदतिसाव्या वर्षी म्हणजे ज्या वर्षी बाबेलचा राजा
अवील-मरोदख राजा झाला, त्याच्या बाराव्या
महिन्याच्या सत्ताविसाव्या दिवशीं त्यानें यहूदाचा राजा
यहोयाखीन यास कारागृहांतून काढून त्याचें शीर वर
केलें. २८ त्याजशीं त्यानें गोड भाषण करून बाबेलांत
जे राजे त्याच्या बंदींत होते त्यांच्याहून त्यांस उच्च
आसन दिलें. २९ त्यानें आपलीं कारागृहांतील वस्त्रें
बदलिलीं, व तो आमरण नित्य राजाच्या पंक्तीस
जेवीत असे. ३० त्याच्या निर्वाहाकरितां त्याला
राजानें कायमची नेमणूक करून दिली, ती त्याला
आमरण नित्य मिळत होती.

# १ इतिहास



१ आदाम, शेथ, अनोश; २ केनान, महललेल,
१ यारेद; ३ हनोख, मथुशलह, लामेख; ४ नोहा,
शेम, हाम व याफेथ.
५ याफेथाचे पुत्र: गोमर, मागोग, मादय, यावान,
तुबाल, मेशेख व तीरास. ६ गोमराचे पुत्र: आष्कनाज,
दीफाथ व तोगार्मा. ७ यावानाचे पुत्र: अलीशा, तार्शीश,
कित्तीम व रोदानीम.
८ हामाचे पुत्र: कूश, मिस्राईम, पूट व कनान.
९ कुशाचे पुत्र: सबा, हवीला, सब्ता, रामा व
साब्तका; आणि रामाचे पुत्र: शबा व ददान. १० कुशाला
निम्रोद झाला; तो पृथ्वीवर महावीर निपजला.
११ मिस्राईम याला लूदीम, अनामीम, लहाबीम,
नाप्तुहीम, १२ पात्रुसीम, कास्लुहीम (यांजपासून
पलिष्टी झाले) व कफतोरीम हे झाले. १३ कनानाला
सीदोन (हा त्याचा ज्येष्ठ पुत्र) हेथ, १४ यबूसी,
अमोरी, गिर्गाशी, १५ हिव्वी, अर्की, शीनी,
१६ आर्वादी, समारी व हमाथी हे झाले.
१७ शेमाचे पुत्र: एलाम, अश्शूर, अर्पक्षद, लूद,
अराम, ऊस, हूल, गेतेर व मेशेख. १८ अर्पक्षदाला
शेलह झाला व शेलहाला एबर झाला. १९ एबरास
दोन पुत्र झाले, एकाचें नांव पेलेग होतें, कारण त्याच्या
वेळीं पृथ्वीची वांटणी झाली; त्याच्या भावाचें नांव
यक्तान होतें. २० यक्तानास अल्मोदाद, शेलेफ,
हसर्मावेथ, येरह, २१ हदोराम, ऊजाल, दिक्ला,
२२ एबाल, अबीमाएल, शबा, २३ ओफीर, हवीला
व योबाब असे पुत्र झाले; हे सगळे यक्तानाचे पुत्र.
२४ शेम, अर्पक्षद, शेलह; २५ एबर, पेलेग;
रऊ; २६ सरूग, नाहोर, तेरह; २७ अब्राम (तोच
अब्राहाम). २८ अब्राहामाचे पुत्र इसहाक व इश्माएल.
२९ त्यांची वंशावळी ही: इश्माएलाचा ज्येष्ठ पुत्र
नबायोथ; त्याच्याखेरीज त्याचे पुत्र हे: केदार, अद्बेल,
मिबसाम, ३० मिश्मा, दुमा, मस्सा, हदद, तेमा,
३१ यतूर, नापीश व केदमा; हे इश्माएलाचे पुत्र.
३२ अब्राहामाची उपपत्नी कटूरा हिचे पुत्र: तिला
जिम्रान, यक्षान, मदान, मिद्यान, इश्बाक व शूह हे
झाले; यक्षानाचे पुत्र: शबा व ददान. ३३ मिद्यानाचे
पुत्र: एफा, एफर, हनोख, अबीदा व एल्दा. हा
सगळा कटूरेचा वंश.
३४ अब्राहामास इसहाक झाला. इसहाकाचे पुत्र:
एसाव व इस्राएल.
३५ एसावाचे पुत्र: अलीपाज, रगुवेल, यऊश,
यालाम व कोरह. ३६ अलीपाजाचे पुत्र: तेमान,
ओमार, सपी, गाताम, कनाज, तिम्ना व अमालेक.
३७ रगुवेलाचे पुत्र: नहाथ, जेरह, शम्मा व मिज्जा.
३८ सेईराचे पुत्र: लोटान, शोबाल, सिबोन, अना,
दीशोन, एसर व दीशान. ३९ लोटानाचे पुत्र: होरी व
होमाम; लोटानाची बहीण तिम्ना. ४० शोबालाचे पुत्र:
आल्यान, मानहाथ, एबाल, शपी व ओनाम. सिबोनाचे
पुत्र: अय्या व अना. ४१ अनाचा पुत्र: दीशोन.
दीशोनाचे पुत्र: हम्रान, एश्बान, यित्राण व करान.
४२ एसरेचा पुत्र: बिल्हान, जावान व याकान. दीशानाचे
पुत्र: ऊस व अरान. ४३ इस्राएल लोकांवर कोणीं
राजानें राज्य करण्यापूर्वी अदोम देशावर ज्या राजांनीं
राज्य केलें ते हे: बौराचा पुत्र बेला; त्याची राजधानी
दीन्हाबा हें नगर होतें. ४४ बेला मेल्यावर बस्रा येथला
जेरहाचा पुत्र योबाब त्याच्या गादीवर बसला.
४५ योबाब मेल्यावर तेमानींच्या देशचा हूशाम
त्याच्या गादीवर बसला. ४६ हूशाम मेल्यावर त्याच्या
जागीं बदादाचा पुत्र हदाद त्याच्या गादीवर बसला;
यानें मवाब मैदानांत मिद्यानांचा मोड केला;
त्याची राजधानी अवीत शहर होतें. ४७ हदाद
मेल्यावर मास्रेका येथील साम्ला त्याच्या गादीवर

बसला. ४८ साम्ला मेल्यावर फरात नदाच्या
तीरींच्या रहोबोथ नांवाच्या नगरांतला शौल त्याच्या
गादीवर बसला. ४९ शौल मेल्यावर अकबोराचा
पुत्र बाल-हानान त्याच्या गादीवर बसला. ५० बाल-
हानान मेल्यावर हदाद त्याच्या गादीवर बसला;
त्याची राजधानी पाई होती; त्याच्या बायकोचें नांव
महेटाबेल: ती मे-जाहाबाची कन्या जी मात्रेद तिची
कन्या होती. ५१ हदाद मेल्यावर अदोमाचे सरदार
झाले ते हे: सरदार तिम्ना, सरदार आल्या, सरदार
यतेथ, ५२ सरदार अहलीबामा, सरदार एला,
सरदार पीनोन, ५३ सरदार कनाज, सरदार तेमान,
सरदार मिब्सार, ५४ सरदार माग्दीएल व सरदार
ईराम. हे अदोमचे सरदार होत.

**२** १ इस्राएलाचे पुत्र हे: रऊबेन, शिमोन, लेवी,
यहूदा, इस्साखार, जबुलून, २ दान, योसेफ,
बन्यामीन, नफताली, गाद व आशेर.
३ यहूदाचे पुत्र हे: एर, ओनान व शेला; हे
तिघे कनानीण बथ-शूवा हिच्या पोटीं त्यास झाले.
यहूदाचा ज्येष्ठ पुत्र एर हा परमेश्वराच्या दृष्टीनें दुष्ट
असल्यामुळें त्यास त्यानें जिवें मारिलें. ४ यहूदाची सून
तामार हिजपासून त्याला पेरेस व जेरह हे झाले;
यहूदास एकंदर पांच पुत्र झाले. ५ पेरेसाचे पुत्र:
हेस्रोन व हामूल; ६ जेरहाचे पुत्र: जिम्री, एथान
हेमान, कल्कोल व दारा असे एकंदर पांच.
७ कर्मीचा पुत्र आखार; यानेंच समर्पित वस्तूंसंबंधानें
आगळीक करून इस्राएलास क्लेश दिला. ८ एथानाचा
पुत्र अजऱ्या. ९ हेस्रोनास झालेले पुत्र यरहमेल,
राम व कलुबाय हे होत. १० रामास अम्मीना-
दाब झाला आणि अम्मीनादाबास यहूदा वंशाचा
सरदार नहशोन हा झाला; ११ नहशोनाला सल्मा
झाला, व सल्माला बवाज झाला; १२ बवाजाला
ओबेद झाला व ओबेदाला इशाय झाला; १३ इशायास
ज्येष्ठ पुत्र अलीयाब, दुसरा अबीनादाब, तिसरा
शिमा, १४ चवथा नथनेल, पांचवा रद्दाय,
१५ सहावा ओसेम व सातवा दावीद हे पुत्र झाले;
१६ व त्यांच्या बहिणी सरूवा व अबीगईल या
होत. सरूवेचे अबीशय, यवाब व असाएल असे
तिघे पुत्र होते. १७ अबीगईलीस अमासा झाला;
अमासाचा बाप येथेर इश्माएली हा होता. १८ कालेब
बिन हेस्रोन यास त्याच्या बायका अजूबा व यरियोथ
यांच्यापासून संतति झाली. अजूबेचे पुत्र येशेर, शोबाब
व अर्दोन हे होत. १९ अजूबा मेल्यावर कालेबानें
एफ्राथेशीं लग्न केलें; तिच्या पोटीं त्यास हूर झाला.
२० हूरास ऊरी झाला व ऊरीस बसलेल झाला.
२१ नंतर हेस्रोन हा गिलादाचा बाप माखीर याच्या
कन्येपाशीं गेला; तो साठ वर्षांचा असतां त्यानें तिजशीं
लग्न केलें व तिच्या पोटीं त्यास सगूब झाला.
२२ सगूबास याईर झाला; याचीं गिलाद प्रांतांत तेवीस
नगरें होतीं. २३ गशूर व अराम यांनीं त्यांच्यापासून
हव्वोथ-याईर व कनाथ आणि त्यांच्या आसपासचीं खेडीं-
पाडीं अशीं एकंदर साठ नगरें हस्तगत केलीं. गिलादाचा
बाप माखीर याची ही संतति होय. २४ हेस्रोन हा
कालेब-एफ्राथ येथें मृत्यु पावल्यावर त्याची बायको
अबीया हिच्या पोटीं त्याला तकोवाचा बाप अश्हूर हा
झाला. २५ हेस्रोनाचा ज्येष्ठ पुत्र यरहमेल याचे पुत्र:
ज्येष्ठ पुत्र राम, बुना, ओरेन, ओसेम व अहीया
हे होत. २६ यरहमेलाची अटारा नांवाची दुसरी
एक बायको होती; ती ओनाम याची आई होय.
२७ यरहमेलाचा ज्येष्ठ पुत्र राम याचे पुत्र: मास,
यामीन व एकर. २८ ओनामाचे पुत्र: शम्मय व
यादा; शम्मयाचे पुत्र: नादाब व अबीशूर. २९ अबी-
शूराच्या बायकोचें नांव अबीहाईल असें होतें;
तिच्या पोटीं त्यास अहबान व मोलीद हे झाले.
३० नादाबाचे पुत्र: सलेद व अप्पईम; सलेद
निपुत्रिक मेला. ३१ अप्पईमाचा पुत्र इशी. इशीचा
पुत्र शेशान. शेशानाचा पुत्र अहलय. ३२ शम्मयाचा
भाऊ यादा याचे पुत्र: येथेर व योनाथान; येथेर
हा निपुत्रिक मेला. ३३ योनाथानाचे पुत्र: पेलेथ व
जाजा. यरहमेलाची संतति ही. ३४ शेशानास पुत्र
नव्हते; कन्या होत्या. त्याचा यरहा नांवाचा एक

मिसरी चाकर होता. ३५ शेशानानें आपली कन्या,
आपला चाकर यरहा यास दिली; तिच्या पोटीं त्यास
अत्ताय झाला. ३६ अत्तायास नाथान झाला,
नाथानास जाबाद झाला; ३७ जाबादास एफ्लाल
झाला, एफ्लालास ओबेद झाला; ३८ ओबेदास
येहू झाला, येहूस अजऱ्या झाला; ३९ अजऱ्यास
हेलस झाला, हेलसाला एलासा झाला; ४० एलासाला
सिस्माय झाला, सिस्मायास शल्लूम झाला; ४१ शल्लूमास
यकम्या झाला; यकम्यास अलीशामा झाला. ४२ यरह-
मेलाचा भाऊ कालेब याचा ज्येष्ठ पुत्र जीफाचा बाप
मेशा; हेब्रोनाचा बाप मारेशा याचा वंशहि त्याच्या-
पासूनच झाला. ४३ हेब्रोनाचे पुत्र: कोरह, तप्पूर, रेकेम
व शमा. ४४ शमास रहम झाला. तो यर्कामाचा बाप;
रेकेमास शम्मय झाला. ४५ शम्मयाचा पुत्र मावोन;
मावोन बेथ-सूराचा बाप. ४६ कालेबाची उपपत्नी
एफा हिला हारान, मोसा व गाजेज हे झाले;
हारानास गाजेज झाला. ४७ यादायाचे पुत्र: रेगेम,
योथाम, गेशान, पेलेट, एफा व शाफ. ४८ कालेबाची
उपपत्नी माका हिला शेबेर व तिऱ्हना हे झाले.
४९ यांशिवाय तिला मद्मानाचा बाप शाफ, आणि
मखबेना व गिबा यांचा बाप शवा हे झाले; कालेबाची
कन्या अखसा. ५० ही कालेबाची संतति होय:
एफ्राथेच्या पोटचा ज्येष्ठ पुत्र हूर, याचा पुत्र किर्याथ-
यारीमाचा बाप शोबाल हा होता. ५१ सल्मा हा
बेथलहेमाचा बाप; हारेफ हा बेथ-गादेराचा बाप.
५२ किर्याथ-यारीमाचा बाप शोबाल याच्या वंशांत
हारोवे व अर्धे मनुहोथवासी हे झाले. ५३ किर्याथ-
यारीम याचीं कुळें: इथ्री, पूथी, शुमाथी व मिश्राई; यांच्या-
पासून सराथीव एष्टाबुली हीं निघालीं. ५४ सल्माचे
वंशज: बेथलहेम, नटोपाथी, अटरोथ-बेथ-यवाब, आणि
अर्धे मानहतवासी म्हणजे सारी; ५५ आणि याबेस
येथें राहणारीं लेखकांचीं कुळें म्हणजे तिराथी,
शिमाथी व सुकाथी. हीं रेखाब घराण्याचा मूळपुरुष
हम्मथ याच्या वंशांतलीं केनी कुळें होत.

३ १ दाविदास हेब्रोन येथें पुत्र झाले ते हे;
अहीनवाम इज्रेलकरणीपासून अम्नोन हा ज्येष्ठ
पुत्र; अबीगईल कर्मेलकरीण हिजपासून दानीएल
हा दुसरा पुत्र; २ गश्शूरचा राजा तलमय याची कन्या
माका हिजपासून अबशालोम हा तिसरा; हग्गीथेचा
पुत्र अदोनीया हा चौथा; ३ अबीटलेपासून शफाट्या
हा पांचवा; व दाविदाची बायको एग्ला हिचा पुत्र
इथ्रम हा सहावा. ४ हे सहा पुत्र त्याला हेब्रोन येथें
झाले; तेथें त्यानें सात वर्षें सहा महिने राज्य केलें.
यरुशलेमांत त्यानें तेहतीस वर्षें राज्य केलें; ५ त्यास
यरुशलेमांत पुत्र झाले ते हे: शिमा, शोबाब, नाथान
व शलमोन, हे चार अम्मीएलाची कन्या बथ-शूवा
हिला झाले; ६ इभार, अलीशामा, एलीफलेट,
७ नोगा, नेफेग, याफीय, ८ अलीशामा, एल्यादा व
एलीफलेट असे नऊ. ९ हे सर्व दाविदाचे पुत्र होत;
यांखेरीज उपपत्नींपासून आणखी पुत्र झाले; त्यांची
बहीण तामार. १० शलमोनाचा पुत्र रहबाम; त्याचा
पुत्र अबीया, त्याचा पुत्र आसा, त्याचा पुत्र यहोशा-
फाट; ११ त्याचा पुत्र योराम, त्याचा पुत्र अहज्या,
त्याचा पुत्र योवाश; १२ त्याचा पुत्र अमस्या, त्याचा पुत्र
अजऱ्या, त्याचा पुत्र योथाम; १३ त्याचा पुत्र आहाज,
त्याचा पुत्र हिज्कीया, त्याचा पुत्र मनश्शे; १४ त्याचा
पुत्र आमोन, त्याचा पुत्र योशीया. १५ योशीयाचे
पुत्र: ज्येष्ठ योहानान, दुसरा यहोयाकीम, तिसरा
सिद्कीया व चौथा शल्लूम. १६ यहोयाकीमाचे पुत्र:
त्याचा पुत्र यखन्या, त्याचा पुत्र सिद्कीया. १७ बंदिवान
यखन्या याचा पुत्र शलतीएल; १८ आणि
मल्कीराम, पदाया, शेनस्सर, यकम्या, होशामा व
नदब्या. १९ पदायाचे पुत्र: जरुब्बाबेल व शिमी;
जरुब्बाबेलाचे पुत्र: मशुल्लाम व हनन्या; त्यांची बहीण
शलोमीथ; २० आणि हशूबा, ओहेल, बरेख्या, हसद्या
व यूशब-हेसेद हे पांच. २१ हनन्याचे पुत्र: पलट्या
व यशाया; रफायाचे पुत्र, अर्णानाचे पुत्र, ओबद्याचे
पुत्र, शखन्याचे पुत्र. २२ शखन्याचा पुत्र शमाया;

शमायाचे पुत्र हट्टूश, इगाल, बारीहा, नाऱ्या व शाफाट
असे सहा. २३ नाऱ्याचे पुत्र: एल्योवेनय, हिज्कीया
व अज्रिकाम असे तीन. २४ एल्योवेनय याचे पुत्र:
होदव्या, एल्याशीब, पलाया, अक्कूब, योहानान, दलाया
व अनानी असे सात.

४ १ यहूदाचे पुत्र: पेरेस, हस्रोन, कर्मी, हूर व
शोबाल. २ राया बिन शोबाल याला यहथ झाला;
यहथाला अहूमय व लहद हे झाले. हीं सराथी
कुळें होत. ३ एटामाच्या बापाचे पुत्र हे: इज्रेल,
इश्मा व इद्बाश; त्यांच्या बहिणीचें नांव हस्सले-
लपोनी असें होतें; ४ आणि गदोराचा बाप पनुएल व
हूशाचा बाप एजेर. बेथलहेमाच्या बापास एफ्राथे-
पासून झालेला ज्येष्ठ पुत्र हूर याची ही संतति.
५ तवाकोचा बाप अश्हूर याला हेला व नारा अशा
दोन बायका होत्या. ६ नारेच्या पोटीं त्यास
अहुज्जाम, येफेर, तेमनी व अहष्टारी झाले. ही
नारेची संतति. ७ हेलेचे पुत्र: सेरथ, इसहार व
एथ्नान. ८ हक्कोसाला आनूब व सोबेबा हे झाले,
तसेंच त्याच्यापासून हारूमाचा पुत्र अहर्हेल याचीं
कुळें निपजलीं. ९ याबेस हा आपल्या भाऊबंदांमध्यें
फार प्रतिष्ठित होता; त्याच्या आईनें त्याचें नांव
याबेस असें ठेवून म्हटलें कीं त्यास प्रसवतांना मला
फार क्लेश झाले. १० याबेसानें इस्राएलाच्या
देवाजवळ वर मागितला तो असा: तूं माझें खरोखर
कल्याण करिशील, माझ्या मुलखाचा विस्तार वाढ-
वेशील आणि मजवर कोणतेंहि अरिष्ट येऊन मीं
दुःखी न व्हावें म्हणून तुझा हात माझ्यावर राहील
तर किती बरें होईल! त्यानें मागितलेला हा वर
देवानें त्यास दिला. ११ शूहाचा भाऊ कलूब याला
महीर झाला; हा एष्टोनाचा बाप १२ एष्टोनास
बेथ-राफा, पासेहा आणि ईर-नाहाश याचा बाप
तहिन्ना हे झाले. हे रेखा येथील लोक होत.
१३ कनाजाचे पुत्र अथनिएल व सराया; अथनिएलाचा
पुत्र हथथ. १४ म्योनोथायास अफ्रा झाला;
सरायास यवाब झाला; हा यवाब गे-हराशीम
कारागिरांचा मूळपुरुष होय. १५ यफुन्नेचा पुत्र
कालेब याचे पुत्र इरु, एला व नाम, एलाकुळांतले
लोक आणि कनज हे याच्यापासून झाले.
१६ यहल्लेल याचे पुत्र: जीफ, जीफा, तीऱ्या व
असरेल. १७ एज्रेचे पुत्र येथे, मरद, येफेर व
यालोन; तसेंच तिला मिर्याम, शम्माय व एष्टमोवाचा
बाप इश्बह हे झाले. १८ त्याच्या यहूदीण बायको-
पासून त्याला गदोराचा बाप येरेद, सोखोचा बाप हेबेर
व जानोहाचा बाप यकूथीएल हे झाले. फारोची कन्या
बिथ्या जी मेरेदानें केली होती तिची ही संतति होय.
१९ नहमाची बहीण होदीयाची बायको झाली,
तिला गार्मीकर कईला याचा बाप व माकाथी एष्ट-
मोवा हे झाले. २० शिमोनाचे पुत्र अम्नोन, रिन्ना,
बेन-हानान व तिलोन आणि इशीचे पुत्र जोहेथ व
बेन-जोहेथ. २१ यहूदाचा पुत्र शेला याच्यापासून
लेखाचा बाप एर, मारेशाचा बाप लादा आणि तलम
सणाचें कसबाचें काम करणाऱ्या अश्बेच्या घराण्यांत
हीं कुळें उत्पन्न झालीं. २२ तसेंच त्याच्यापासून योकीम,
कोजेबा येथील लोक, योवाश, मवाबावर सत्ता
चालविणारे साराफ व याशूबी-लेहेम हे निपजले. हा
प्राचीन वृत्तांत होय. २३ हे कुंभार असून नताईम व
गदेरा येथें राहत असत; ते राजाचें कामकाज करून
त्याच्यापाशीं राहत असत.

२४ शिमोनाचे पुत्र: नमुवेल, यामीन, यरिब,
जेरह व शौल; २५ त्याचा पुत्र शल्लूम; त्याचा पुत्र
मिबसाम; त्याचा पुत्र मिश्मा. २६ मिश्माची संतति:
त्याचा पुत्र हम्मूएल, त्याचा पुत्र जक्कूर, त्याचा पुत्र
शिमी. २७ शिमीस सोळा पुत्र व सहा कन्या झाल्या;
पण त्याच्या भावांस फारशी संतति झाली नाहीं आणि
त्यांचा वंश यहूदाच्या वंशाप्रमाणें वृद्धि पावला नाहीं.
२८ ते वस्ती करून राहिले ते गांव हे: बैर-शेबा,
मोलादा व हसर-शुवाल; २९ बिल्हा, असेम, तोलाद.
३० बथुवेल, हर्मा, सिक्लाग, ३१ बेथ-मर्काबोथ,
हसर-सुसीम, बेथ-बिरी व शाराइम. दाविदाच्या कार-
कीर्दीपर्यंत हीं त्यांचीं नगरें होतीं. ३२ त्यांचे गांव

एटाम, अईन, रिम्मोन, तोखेन आणि आशान अशीं
पांच नगरें; ३३ आणि बालापर्यंतचीं त्याच नगरांच्या
आसपासचीं खेडींपाडीं; त्यांचीं वसतिस्थानें व
वंशावळ्या ह्या होत. ३४ मेशोबाब, यम्लेक व योशा
बिन अमस्या; ३५ योएल, येहू बिन योशिब्या
बिन सराया बिन असिएल; ३६ एल्योवेनाय,
याकोबा, यशोहाया, असाया, अदिएल, यशीमिएल व
बनाया; ३७ जीजा बिन शिफी बिन अल्लोन बिन
यदाया बिन शिम्री बिन शमाया; ३८ ज्यांचीं
नांवें येथें दाखल केलीं आहेत ते सर्व आप-
आपल्या कुळांचे प्रमुख होते; त्यांच्या घराण्यांची
सपाट्यानें वाढ झाली. ३९ ते आपल्या शेरडांमेंढरां-
साठीं चारा शोधावयास गदोर घाटांत खोऱ्याच्या
पूर्वेपर्यंत गेले. ४० तेथें त्यांस कसदार व उत्तम चारा
सांपडला, आणि तो देश विस्तीर्ण असून शांत व
निर्भय होता; तेथें पूर्वीपासून हामाचे वंशज राहत
असत. ४१ ज्यांचीं नांवें वर दाखल केलीं आहेत
त्यांनीं यहूदाचा राजा हिज्कीया याच्या कारकीर्दीत
तेथें येऊन तेथील मूनी नांवाच्या लोकांचा त्यांच्या
डेऱ्यांसुद्धां अगदीं संहार करून ते त्यांच्या ठिकाणीं
आजपर्यंत वसले आहेत; कारण त्या ठिकाणीं त्यांच्या
शेरडांमेंढरांसाठीं चारा होता. ४२ त्यांपैकीं म्हणजे
शिमोनाच्या वंशजांतल्या पांचशें पुरुषांनीं इशीचे पुत्र
पलट्या, नाऱ्या, रफाया व उज्जियेल यांस आपले
नायक केलें आणि ते सेईर पहाडावर गेले. ४३ तेथें
जे अमालेकी उरले होते त्यांचा संहार करून तेथें ते
आजवर वस्ती करून आहेत.

१ इस्राएलाचा ज्येष्ठ पुत्र रऊबेन याची वंशा-
५ वळी: रऊबेन हा ज्येष्ठ पुत्र होता खरा, पण त्यानें
आपल्या बापाची खाट भ्रष्ट केली म्हणून त्याचा
ज्येष्ठपणाचा हक्क इस्राएलपुत्र योसेफ याच्या संततीस
देण्यांत आला, तरी पण वंशावळी ज्येष्ठपणाच्या हक्काप्रमाणें
नमूद करण्यांत आली नाहीं; २ कारण यहूदाचें वर्चस्व
त्याच्या बांधवांवर स्थापित होऊन त्याच्या वंशांतला राजा
झाला, पण ज्येष्ठत्वाचा हक्क योसेफाचाच होता. ३ इस्राएलाचा
ज्येष्ठ पुत्र रऊबेन याचे पुत्र हनोख, पल्लू, हेस्रोन व
कर्मी. ४ योएलाचे पुत्र: त्याचा पुत्र शमाया, त्याचा
पुत्र गोग, त्याचा पुत्र शिमी; ५ त्याचा पुत्र मीखा,
त्याचा पुत्र राया, त्याचा पुत्र बाल; ६ त्याचा पुत्र
बैरा, ह्यास अश्शूरचा राजा तिल्गथ-पिल्नेसर यानें
कैद करून नेलें; तो रऊबेन वंशाचा सरदार होता.
७ त्याच्या भावांची वंशावळी त्यांच्या कुळांप्रमाणें
लिहिली ती अशी: त्यांतला प्रमुख ईयेल, जखऱ्या,
८ बेला बिन आजाज बिन शमा बिन योएल; हा वंश
नबो व बालमौन येथपर्यंत अरोएरांत वस्ती करून
राहिला. ९ पूर्वेकडे महानद फरात याजवळील रानाच्या
सीमेपर्यंत त्यानें वस्ती केली; कारण गिलाद देशांत
त्यांचीं गुरेंढोरें मनस्वीं वाढलीं होतीं. १० शौलाच्या
कारकीर्दीत त्यांनीं हग्री लोकांशीं युद्ध करून त्यांचा
संहार केला तेव्हां ते गिलादच्या पूर्वेकडील सगळ्या
प्रदेशांत त्यांच्या डेऱ्यांत राहूं लागले.

११ गादाचे वंशज त्यांच्यासमोर सलका येथवर
बाशान प्रदेशांत राहत होते; १२ त्यांतला प्रमुख
योएल व दुय्यम शाफाम यांखेरीज यानय व शाफाट
हे बाशानांत राहत होते; १३ त्यांच्या पितृकुळां-
प्रमाणें त्यांचे बांधव मीखाएल, मशुल्लाम, शबा, योरय,
याकान, जीया व एबर असे सात होते. १४ हे सर्व
अबीहईल बिन हूरी बिन यारोह बिन गिलाद बिन
मीखाएल बिन यशीशाय बिन यहदो बिन बूज याचे
वंशज होत; १५ अही बिन अब्दीएल बिन गूनी हा
त्यांच्या पितृकुळांचा प्रमुख होता. १६ ते लोक
गिलादांत व बाशानांत खेड्यापाड्यांत आणि शारोनच्या
शिवारांत आपल्या सीमेच्या आंत वस्ती करून होते.
१७ ह्या सर्वांची वंशावळी यहूदाचा राजा योथाम व
इस्राएलाचा राजा यराबाम ह्यांच्या कारकीर्दीत लिहिली.

१८ रऊबेनी, गादी, व मनश्शाच्या अर्ध्या वंशांतील
लोक यांच्यांतले बलवान् पुरुष ढालाईत, धारकरी,
धनुर्धारी व युद्धकलानिपुण असे चवेचाळीस हजार सातशें

१ याचें नांव २ राजे १५:२९ व १६:७ येथें
तिग्लथ-पिलेसर असें आहे.

साठ लढाईस जाण्याजोगे लोक होते. १९ त्यांनीं
हगरी, यतूर, नाफीश व नोदाब यांच्याशीं संग्राम केला.
२० त्यांच्याशीं लढण्यास त्यांस कुमक मिळून त्यांनीं हगरी
व त्यांच्याबरोबरचे इतर लोक यांस पादाक्रांत केलें,
कारण युद्धसमयीं त्यांनीं देवाचा धावा केला; त्यांनीं
त्याजवर भरंवसा ठेविला होता म्हणून त्यानें त्यांची
प्रार्थना ऐकली. २१ त्यांनीं त्यांचीं गुरेंढोरें हरण केलीं;
पन्नास हजार उंट, दोन लक्ष पन्नास हजार मेंढरें, दोन
हजार गाढवें एवढीं जनावरें व एक लक्ष मनुष्यें
त्यांनीं नेलीं. २२ बहुत लोकांचा संहार झाला, कारण
युद्ध देवाच्या पक्षाचें होतें. त्यांचा स्वतांचा पाडाव
होईपर्यंत ते त्यांच्या ठिकाणीं वस्ती करून राहिले.

२३ मनश्शाच्या अर्ध्या वंशांतील लोकांनीं त्या
देशीं वस्ती केली; बाशानापासून बाल-हर्मोन, सनीर,
व हर्मोन पर्वत येथपावेतों त्यांचा विस्तार झाला.
२४ त्यांच्या पितृकुळांपैकीं प्रमुख पुरुष होते ते हे:
एफेर, इशी, अलीएल, अज्रीएल, यिर्मया, होदव्या व
यहदीएल; हे महावीर व नामांकित पुरुष असून आप-
आपल्या पितृकुळांचे प्रमुख होते.

२५ त्यांनीं आपल्या पूर्वजांच्या देवाशीं फितुरी
केली, आणि देवानें त्यांच्यापुढून ज्या लोकांचा नाश
केला होता त्यांच्या अन्य देवांच्या नादीं लागून ते अत्या-
चारी बनले. २६ यास्तव इस्राएलाच्या देवानें अश्शूरचा
राजा पूल आणि त्याच देशाचा राजा तिल्गथ-पिल्नेसर
यांस उठविलें; त्यानें रऊबेनी, गादी व मनश्शाच्या अर्ध्या
वंशाचे लोक यांस पाडाव करून हलह, हाबोर, हारा
येथें व गोजान नदीपर्यंत त्यांस नेऊन ठेविलें व
तेथेंच ते आजवर वस्ती करून राहिले आहेत.

६ [1]१ लेवीचे पुत्र: गेर्षोन, कहाथ व मरारी.
२ कहाथाचे पुत्र: अम्राम, इसहार, हेब्रोन व उज्जि-
येल. ३ अम्रामाची संतति: अहरोन, मोशे व मिर्याम.
अहरोनाचे पुत्र: नादाब, अबीहू, एलाजार व इथामार.
४ एलाजारास फिनहास झाला, फिनहासास अबीशूवा
झाला, ५ अबीशूवास बुक्की झाला, बुक्कीस उज्जी झाला,
६ उज्जीस जरह्या झाला, जरह्यास मरायोथ झाला,
७ मरायोथास अमऱ्या झाला, अमऱ्यास अहीटूब झाला.
८ अहीटूबास सादोक झाला, सादोकास अहीमास
झाला, ९ अहीमासास अजऱ्या झाला, अजऱ्यास
योहानान झाला, १० योहानानास अजऱ्या झाला;
शलमोनानें यरुशलेमांत जें मंदिर बांधिलें होतें त्यांत
हा याजकाचें काम करीत असे. ११ अजऱ्यास अमऱ्या
झाला, अमऱ्यास अहीटूब झाला, १२ अहीटूबास
सादोक झाला, सादोकास शल्लूम झाला, १३ शल्लूमास
हिल्कीया झाला, हिल्कीयास अजऱ्या झाला, १४ अज-
ऱ्यास सराया झाला, सरायास यहोसादाक झाला.
१५ परमेश्वरानें नबूखद्नेस्सराच्या हस्तें यहूदा व यरुश-
लेम यांचा पाडाव केला तेव्हां यहोसादाक कैदी झाला.

१६ लेवीचे पुत्र: गर्षोम, कहाथ व मरारी.
१७ गर्षोमाच्या पुत्रांचीं नांवें लिब्नी व शिमी अशीं
होतीं. १८ कहाथाचे पुत्र: अम्राम, इसहार, हेब्रोन, व
उज्जीयेल. १९ मरारीचे पुत्र: महली व मूशी. त्यांच्या
त्यांच्या पितृकुळांप्रमाणें लेव्यांचीं कुळें हींच होत.
२० गर्षोमाचा वंश: त्याचा पुत्र लिब्नी, त्याचा पुत्र
यहथ, त्याचा पुत्र जिम्मा, २१ त्याचा पुत्र यवाह,
त्याचा पुत्र इद्दो, त्याचा पुत्र जेरह व त्याचा पुत्र यात्राय.
२२ कहाथाची संतति: त्याचा पुत्र अम्मीनादाब, त्याचा
पुत्र कोरह, त्याचा पुत्र अस्सीर, २३ त्याचा पुत्र एल-
काना, त्याचा पुत्र एब्यासाफ, त्याचा पुत्र अस्सीर झाला;
२४ त्याचा पुत्र तहथ, त्याचा पुत्र उरीएल, त्याचा पुत्र
उज्जीया आणि त्याचा पुत्र शौल. २५ एलकानाचे पुत्र:
अमासय व अहीमोथ. २६ एलकानाचा वंश: त्याचा
पुत्र सोफय, त्याचा पुत्र नहथ, २७ त्याचा पुत्र
अलीयाब, त्याचा पुत्र यरोहाम व त्याचा पुत्र एलकाना.
२८ शमुवेलाचे पुत्र: ज्येष्ठ योएल व दुसरा अबीया.
२९ मरारीची संतति: महली, याचा पुत्र लिब्नी,
त्याचा पुत्र शिमी, त्याचा पुत्र उज्जा, ३० त्याचा पुत्र
शिमा, त्याचा पुत्र हग्गीया व त्याचा पुत्र असाया.

३१ कोश स्थायिक झाल्यावर दाविदानें परमे-
श्वराच्या मंदिरांत जे गायकगण नेमिले होते ते हे:

१ मुळांत: वश्नी; पण ६:३३ पाहा.

३२ यरुशलेमांत शलमोन परमेश्वराचें मंदिर बांधीपर्यंत
ते दर्शनमंडपाच्या निवासमंडपासमोर गायनपूर्वक सेवा
करीत व ते आपल्या कामावर क्रमानुसार हजर राहत.
३३ तेथें हजर असत ते व त्यांचे पुत्र हे : कहाथी वंशा-
पैकीं गायक हेमान, बिन योएल, बिन शमुवेल, ३४ बिन
एलकाना, बिन यरोहाम, बिन अलीएल, बिन तोहा,
३५ बिन सूफा, बिन एलकाना, बिन महथ, बिन अमा-
सय, ३६ बिन एलकाना, बिन योएल, बिन अजऱ्या,
बिन सफन्या, ३७ बिन तहथ, बिन अस्सीर, बिन
एब्यासाफ, बिन कोरह, ३८ बिन इसहार, बिन कहाथ,
बिन लेवी, बिन इस्राएल; ३९ आणि त्याचा भाऊ
आसाफ त्याच्या उजवीकडे उभा असे, म्हणजे आसाफ
बिन बरेख्या, बिन शिमा, ४० बिन मिखाएल, बिन
बासेया, बिन मल्कीया, ४१ बिन एथनी, बिन जेरह,
बिन अदाया, ४२ बिन एथान, बिन जिम्मा, बिन
शिमी, ४३ बिन यहथा, बिन गर्षोम, बिन लेवी;
४४ त्यांचे भाऊ मरारीचे वंशज त्याच्या डावीकडे उभे
असत ते : एथान बिन किशी, बिन अब्दी, बिन मल्लूख,
४५ बिन हशब्या, बिन अमस्या, बिन हिल्कीया,
४६ बिन अमसी, बिन बानी, बिन शेमे, ४७ बिन
महली, बिन मूशी, बिन मरारी, बिन लेवी. ४८ त्यांचे
भाऊबंद जे लेवी ते देवाच्या मंदिराच्या निवास-
मंडपाच्या सर्व सेवेसाठीं वाहिलेले होते.

४९ अहरोन व त्याचे पुत्र हे होमवेदीवर व
धूपवेदीवर अर्पणें करीत. परमपवित्रस्थानासंबंधाचें
सर्व काम करीत आणि इस्राएल लोकांसाठीं प्राय-
श्चित्त करीत; देवाचा सेवक मोशे याच्या आज्ञेप्रमाणें
ते करीत. ५० अहरोनाचे वंशज हे : त्याचा पुत्र
एलाजार, त्याचा पुत्र फिनहास, त्याचा पुत्र अबीशूवा,
५१ त्याचा पुत्र बुक्की, त्याचा पुत्र उज्जी, त्याचा पुत्र
जरह्या, ५२ त्याचा पुत्र मरायोथ, त्याचा पुत्र अमऱ्या,
त्याचा पुत्र अहीटूब, ५३ त्याचा पुत्र सादोक
व त्याचा पुत्र अहीमास.

५४ अहरोन वंशजांची वस्ती त्यांच्या हद्दींतील
किल्ल्याकिल्ल्यांनींहि आहे : कहाथ घराण्याच्या
नांवाची पहिली चिठ्ठी निघाली म्हणून ५५ यहूदा
देशांतील हेब्रोन त्याच्या शिवारांसुद्धां त्यांस दिलें;
५६ पण त्या नगराचीं शेतेंपोतें व खेडींपाडीं यफुन्नेचा
पुत्र कालेब यास दिलीं. ५७ अहरोनाच्या वंशजांस शरण-
पुरें म्हणून दिलीं तीं हीं: हेब्रोन, लिब्ना व त्याचें शिवार,
यत्तीर, एष्टमोवा व त्याचें शिवार, ५८ हीलेन व त्याचें
शिवार, दबीर व त्याचें शिवार, ५९ आशान व त्याचें
शिवार, बेथ-शेमेश व त्याचें शिवार, ६० बन्यामिनाच्या
वंशाचें गिबा व त्याचें शिवार, अलेमेथ व त्याचें शिवार
आणि अनानोथ व त्याचें शिवार; त्यांच्या घराण्यांचीं
एकंदर सगळीं नगरें तेरा होतीं. ६१ अवशिष्ट राहि-
लेल्या कहाथी वंशजांस चिठ्ठ्या टाकून मनश्शाच्या अर्ध्या
वंशांच्या मुलखांतून दहा नगरें दिलीं. ६२ गर्षोम
वंशजांस; त्यांच्या त्यांच्या कुळांप्रमाणें इस्साखार,
आशेर, नफताली व बाशानांत राहणारा मनश्शे
वंश यांचीं तेरा नगरें दिलीं. ६३ मरारी वंशजांस
त्यांच्या त्यांच्या कुळांप्रमाणें रऊबेन, गाद व जबुलून
या वंशांच्या मुलखांतून चिठ्ठ्या टाकून बारा नगरें
दिलीं. ६४ इस्राएल लोकांनीं लेव्यांस हीं नगरें त्यांच्या
शिवारांसुद्धां दिलीं. ६५ त्यांनीं यहूदा, शिमोन व
बन्यामीन या वंशांच्या मुलखांतून वर सांगितलेलीं
नगरें दिलीं. ६६ कहाथ वंशांतील कांहीं कुळांस
एफ्राइमाच्या वंशांतील मुलखांतलीं नगरें मिळालीं तीं
हीं: ६७ एफ्राइमाच्या डोंगराळ प्रदेशांतील शरणपूर
शखेम व त्याचें शिवार, तसेंच गेजेर व त्याचें शिवार,
६८ यकमाम व त्याचें शिवार, बेथ-होरोन व त्याचें
शिवार, ६९ अयालोन व त्याचें शिवार, गथ-रिम्मोन
व त्याचें शिवार; ७० तसेंच मनश्शाच्या अर्ध्या
वंशांतून आनेर व त्याचें शिवार आणि बिलाम व त्याचें
शिवार हीं कहाथ वंशांतील अवशिष्ट वंशजांस दिलीं.
७१ गर्षोमच्या वंशजांस जीं नगरें मिळालीं तीं हीं:
मनश्शाच्या अर्ध्या वंशांतून बाशानांतलें गोलान व त्याचें
शिवार, अष्टारोथ व त्याचें शिवार; ७२ इस्साखाराच्या
वंशांतून केदेश व त्याचें शिवार, दाबरथ व त्याचें
शिवार, ७३ रामोथ व त्याचें शिवार आणि आनेम व

त्याचें शिवार हीं दिलीं; ७४ आशेरच्या वंशांतून माशाल
व त्याचें शिवार, अब्दोन व त्याचें शिवार, ७५ हूकोक व
त्याचें शिवार आणि रहोब व त्याचें शिवार हीं दिलीं;
७६ नफताली वंशांतून गालीलांतलें केदेश व त्याचें
शिवार, हम्मोन व त्याचें शिवार आणि किर्याथाईम व
त्याचें शिवार हीं दिलीं. ७७ लेवीच्या बाकीच्या वंशजांस
म्हणजे मरारी वंशजांस जीं नगरें दिलीं तीं हीं:
जबुलूनाच्या वंशांतून रिम्मोनो व त्याचें शिवार आणि
ताबोर व त्याचें शिवार; ७८ यार्देनेपलीकडे यरीहो-
जवळ, यार्देनेच्या पूर्वेकडील रऊबेन वंशांतून रानांतलें
बेसेर व त्याचें शिवार, यहसा व त्याचें शिवार,
७९ कदेमोथ व त्याचें शिवार आणि मेफाथ व त्याचें
शिवार हीं दिलीं; ८० आणि गाद वंशांतून गिलादी
रामोथ व त्याचें शिवार, महनाइम व त्याचें शिवार,
८१ हेशबोन व त्याचें शिवार आणि याजेर व
त्याचें शिवार, हीं दिलीं.

१ इस्साखाराचे पुत्र तोला, पुवा, याशूब, व
७ शिम्रोन असे चार. २ तोलाचे पुत्र: उज्जी, रफाया,
यरीएल, यहमय, इबसाम व शमुवेल; हे आपला
बाप तोला याच्या घराण्याचे प्रमुख असून आपल्या
पिढींतले शूर वीर पुरुष होते; त्यांची संख्या दाविदाच्या
काळीं बावीस हजार सहाशें होती. ३ उज्जीचा पुत्र
इज्रह्या; इज्रह्याचे पुत्र मिखाएल, ओबद्या, योएल व
इश्शीया असे पांच होते; हे सर्व प्रमुख पुरुष होते.
४ त्यांच्या कुळांप्रमाणें व पितृकुळांप्रमाणें लढाईच्या
सैन्याच्या टोळ्यांत त्यांचे छत्तीस हजार पुरुष असत;
कारण त्यांना बायका व मुलें पुष्कळ होतीं. ५ इस्सा-
खाराच्या सर्व कुळांतले त्यांचे भाऊबंद शूर पुरुष होते;
वंशावळींत ते एकंदर सत्याऐशीं हजार नमूद झाले होते.

६ बन्यामिनाचे पुत्र: बेला व बेकर व यदीएल असे
तिघे. ७ बेलाचे पुत्र: एस्बोन, उज्जी, उज्जियेल, यरीमोथ
व ईरी असे पांच; हे आपल्या पितृकुळांचे प्रमुख
असून शूर वीर होते; वंशावळींत ते बावीस हजार
चौतीस नमूद झाले होते. ८ बेकेराचे पुत्र: जमीरा,
योवाश, अलियेजर, एल्योवेनय, अम्री, यरेमोथ,
अबीया, अनाथोथ व अलेमेथ. हे सर्व बेकेराचे पुत्र.
९ ते आपआपल्या पितृकुळांचे प्रमुख असून शूर
वीर होते. वंशावळींत ते वीस हजार दोनशें नमूद
झाले होते. १० यदीएलाचा पुत्र बिल्हान; बिल्हानाचे पुत्र
यऊश, बन्यामीन, एहूद, कनाना, जेथान, तार्शीश व
अहीशाहर. ११ हे सर्व यदीएलाचे वंशज; ते आपल्या
पितृकुळांचे प्रमुख असून शूर वीर होते; सेनेबरोबर
जाण्यास लायक असे ते सतरा हजार दोनशें होते.
१२ ईराचे वंशज: शुप्पीम व हुप्पीम; आणि अहेराचे
वंशज हुशीम.

१३ नफतालीचे पुत्र यहसिएल, गूनी, येसर व
शल्लूम, ही बिल्हेची संतति.

१४ मनश्शाचे पुत्र: त्याच्या बायकोपासून त्याला
अस्रीएल झाला; त्याच्या अरामी उपपत्नीपासून
त्यास गिलादाचा बाप माखीर हा झाला.
१५ माखीरानें हुप्पीम व शुप्पीम यांची बहीण बायको
केली; तिचें नांव माका; दुसऱ्या पुत्राचें नांव सलाफ-
हाद; सलाफहादाला कन्याच होत्या. १६ माखीराची
बायको माका हिला पुत्र झाला त्याचें नांव तिनें पेरेस
ठेविलें व त्याच्या भावाचें नांव शेरेश होतें; त्याचे पुत्र
ऊलाम व रेकेम. १७ ऊलामाचा पुत्र बदान. गिलाद
बिन माखीर बिन मनश्शे याचे पुत्र हे. १८ त्याची
बहीण हम्मोलेखेथ हिला इशहोद, अबीयेजेर व महला
हीं झालीं. १९ शमीदाचे पुत्र: अह्यान, शेखेम, लिखी
व अनीयाम.

२० एफ्राइमाचे पुत्र: त्याचा पुत्र शुथेलह, त्याचा
पुत्र बेरेद, त्याचा पुत्र तहथ, त्याचा पुत्र एलादा,
त्याचा पुत्र तहथ, २१ त्याचा पुत्र जाबाद, त्याचा
पुत्र शुथेलह आणि एजेर व एलद; त्यांस गथाच्या
मूळच्या रहिवाश्यांनीं मारून टाकिलें, कारण त्यांचीं
गुरेंढोरें हरण करण्यास ते गेले होते. २२ यामुळें
त्यांचा बाप एफ्राईम यानें बहुत दिवस शोक केला,
आणि त्याचे भाऊबंद त्याचें सांत्वन करण्यास आले.
२३ तो आपल्या बायकोपाशीं गेला आणि ती
गर्भवती होऊन तिला एक पुत्र झाला; त्यानें त्याचें

नांव बरीया ( भाग्यहीन ) असें ठेविलें, कारण त्याच्या
घराण्यावर दुर्दैव ओढवलें होतें. २४ त्याची कन्या
शेरा; तिनें खालचें व वरचें बेथ-होरोन व उज्जेन-
शेरा हीं वसविलीं. २५ त्याचे पुत्र रेफह व रेशेफ;
रेशेफाचा पुत्र तेलह, त्याचा पुत्र तहन, २६ त्याचा
पुत्र लादान, त्याचा पुत्र आम्मीहूद, त्याचा पुत्र
अलीशामा, २७ त्याचा पुत्र नून व त्याचा पुत्र
यहोशवा. २८ त्यांचीं वतनें व वसतिस्थानें हीं होत:
बेथेल व त्याच्या लगत्याचीं खेडीं, पूर्वेस नारान,
पश्चिमेस गेजेर व त्याचीं खेडीं, शखेम व त्याचीं
खेडीं, गज्जा व त्याचीं खेडीं एथपर्यंत; २९ त्या-
प्रमाणेंच मनश्शाच्या वंशजांच्या सीमेवरील बेथ-शान
व त्याचीं खेडीं, तानख व त्याचीं खेडीं, मगिद्दो व
त्याचीं खेडीं, दोर व त्याचीं खेडीं; यांत इस्राएलाचा
पुत्र योसेफ याचे वंशज राहत होते.

३० आशेराचे पुत्र: इम्ना, इश्वा, इश्वी, बरीया व
त्यांची बहीण सेराह. ३१ बरीयाचे पुत्र: हेबेर व
मालकीएल, हा बिर्जोविथाचा बाप. ३२ हेबेरास
यफलेट, शोमेर, होथाम व त्यांची बहीण शूवा हीं
झालीं. ३३ यफलेटाचे पुत्र: पासख, बिम्हाल व
अश्वाथ; ही यफलेटाची संतति. ३४ शेमेराचे पुत्र:
अही, राहागा, यहूबा व अराम. ३५ त्याचा भाऊ
हेलेम याचे पुत्र सोफह, इम्ना, शेलेश व आमाल.
३६ सोफहाचे पुत्र: सूहा, हर्नेफेर, शूवाल, बेरी, इम्रा,
३७ बेसेर, होद, शम्मा, शिलशा, इथ्रान व बैरा.
३८ येथेराचे पुत्र: यफुन्ने, पिस्पा व अरा. ३९ उल्लाचे
पुत्र: आरह, हन्निएल व रिस्या. ४० हे सर्व आशेराचे
वंशज होते; हे आपल्या पितृकुळांचे प्रमुख असून
निवडक महावीरांचे व सरदारांचे अग्रणी होते; आणि
लढाईच्या कामगिरीसाठीं त्यांची टीप घेतली तेव्हां
ते सव्वीस हजार भरले.

१ बन्यामिनाला ज्येष्ठ पुत्र बेला, दुसरा
८ आश्बेल, तिसरा अहरह, २ चवथा नोहा व
पांचवा राफा हे झाले. ३ बेलाचे पुत्र: अद्दार, गेरा,
अबीहूद, ४ अबीशूवा, नामान, अहोह, ५ गेरा,
शफूफान व हुराम. ६ एहूदाचे पुत्र गेबा येथल्या
पितृकुळांचे प्रमुख होते; त्यांस पाडाव करून
मानाहथ येथें नेलें; ७ नामान, अहीया व गेरा यांस
त्यानें कैद करून नेलें; त्यास उज्जा व अहीहूद हे
झाले. ८ त्यांस घालवून दिल्यावर मवाबाच्या
पठारांत शहरयिमास संतति झाली; त्याच्या बायका
हुशीम व बारा ह्या होत्या. ९ त्याची बायको
होदेश, हिच्या पोटीं त्यास योबाब, सिब्या, मेशा,
मल्काम, १० यऊस, शख्या व मिर्मा हे झाले. हे
त्याचे पुत्र त्यांच्या पितृकुळांतले प्रमुख होत.
११ हुशीमेपासून त्यास अबीटूब व एल्पाल झाले.
१२ एल्पालाचे पुत्र एबर, मिशाम व शमेद; शमेदानें
ओनो व लोद आणि त्यांचीं खेडींपाडीं वसविलीं;
१३ बरीया व शमा, हे अयालोनकरांच्या पितृ-
कुळांतील प्रमुख पुरुष होते व त्यांनीं गथकरांस
पळवून लाविलें; १४ अह्यो, शाशक, यरेमोथ,
१५ जबद्या, अराद, एदर, १६ मीखाएल इश्पा व
योहा, हे बरीयाचे पुत्र; १७ जबद्या, मशुल्लाम,
हिज्की, हेबेर; १८ इश्मरय, इज्लीया व योबाब
हे एल्पालाचे पुत्र; १९ याकीम, जिख्री, जब्दी,
२० एलीएनय, सिल्थय, अलीएल, २१ अदाया,
बराया व शिम्राथ हे शिमीचे पुत्र; २२ इश्पान,
एबर, अलीएल; २३ अब्दोन, जिख्री, हानान,
२४ हनन्या, एलाम, अनथोथीया, २५ इफदया व
पनुएल हे शाशकाचे पुत्र; २६ शम्शरय, शहऱ्या,
अथल्या, २७ यारेश्या, एलीया व जिख्री हे यरो-
हामाचे पुत्र; २८ हे आपआपल्या पिढींत आपआपल्या
पितृकुळांतले प्रमुख पुरुष असून यरुशलेम येथें
राहत असत. २९ गिबोनांत गिबोनाचा बाप राहत
होता, त्याच्या बायकोचें नांव माका; ३० त्याचे पुत्र:
ज्येष्ठ अब्दोन, सूर, कीश, बाल, नादाब, ३१ गदोर,
अह्यो व जेखर. ३२ मिक्लोथास शिमा झाला.
हे आपल्या भाऊबंदांसमोर त्यांच्याबरोबर यरुशलेम
येथें वस्ती करून होते. ३३ नेराला कीश झाला;
किशास शौल झाला; शौलास योनाथान, मल्कीशूवा,

अबीनादाब व एश्बाल हे होते. ३४ योनाथानाचा
पुत्र मरीब्बाल; मरीब्बाल यास मीखा झाला.
३५ मीखाचे पुत्र: पीथोन, मेलेख, तरेया व आहाज,
३६ आहाजास यहोअद्दा झाला; यहोअद्दास आलेमेथ,
अजमावेथ व जिम्री हे झाले; जिम्रीस मोसा झाला.
३७ मोसाला बिना झाला; त्याचा पुत्र राफा, त्याचा पुत्र
एलासा व त्याचा पुत्र आसेल; ३८ आसेलास सहा पुत्र
होते, त्यांचीं नांवें हीं: अज्रीकाम, बोखरू, इश्माएल,
शाऱ्या, ओबद्या व हान; हे सर्व आसेलाचे पुत्र.
३९ त्याचा भाऊ एशेक याचे पुत्र: ज्येष्ठ उलाम,
दुसरा यऊश व तिसरा अलीफलेत. ४० उलामाचे
वंशज शूर वीर असून धनुर्धारी होते; त्यांचे
पुत्रपौत्र मिळून दीडशें होते. हे सर्व बन्यामिनाच्या
वंशांतले होत.

१ ह्या प्रकारें सर्व इस्राएल लोकांची त्यांच्या
९ त्यांच्या वंशाप्रमाणें गणती झाली; त्यांच्या वंशा-
वळ्या इस्राएलाच्या राजांच्या बखरींत नमूद केल्या
आहेत; यहूदी लोकांनीं पाप केल्यामुळें त्यांस
पाडाव करून बाबेल देशीं नेलें. २ जे प्रथम आपल्या
वतनाच्या नगरांत राहण्यास आले ते इस्राएली,
याजक, लेवी व नथीनीम हे होते. ३ यहूदी, बन्या-
मिनी, एफ्राइमी व मनश्शे यांच्यापैकीं जे यरुशलेमांत
राहण्यास आले ते हे: ४ ऊथय बिन अम्मीहूद
बिन अम्री बिन इम्री बिन बानी; हा बानी, पेरेस
बिन यहूदा याच्या वंशांतला होता. ५ शिलोन्यांपैकीं
ज्येष्ठ पुत्र असाया व त्याचे पुत्र. ६ जेरहाच्या
पुत्रांतला यऊवेल व त्याचे सहाशें नव्वद भाऊबंद.
७ बन्यामिनाच्या वंशांतील हे: सल्लू बिन मशुल्लाम बिन
होदव्या, बिन हस्सनुवा; ८ इबनया बिन यहोराम,
एला बिन उज्जी, बिन मिख्रि आणि मशुल्लाम बिन
शफाट्या बिन रगुवेल, बिन इबनीया, ९ आणि
त्यांच्या त्यांच्या कुळांप्रमाणें त्यांचे भाऊबंद नऊशें
छप्पन्न होते. हे सर्व पुरुष आपआपल्या पितृकुळांप्रमाणें
आपआपल्या घराण्यांचे प्रमुख होते.

१० याजकांपैकीं यदया, यहोयारीब व याखीन;
११ आणि अजऱ्या बिन हिल्कीया, बिन मशुल्लाम,
बिन सादोक, बिन मरायोथ, बिन अहीटूब; हा देवाच्या
मंदिराचा शास्ता होता; १२ अदाया बिन यहोराम, बिन
पशहूर, बिन मल्कीया, आणि मसय बिन अदीएल,
बिन यहजेरा, बिन मशुल्लाम, बिन मशिल्लेमीथ, बिन
इम्मेर; १३ आणखी त्यांचे भाऊबंद, त्यांच्या पितृ-
कुळांचे प्रमुख एक हजार सातशें साठ होते;
परमेश्वराच्या मंदिराची सेवा करण्याच्या कामीं हे
पुरुष फार वाकबगार होते. १४ लेव्यांपैकीं शमाया
बिन हश्शूब, बिन अज्रीकाम, बिन हशब्या हे मरारी
कुळांतले होते; १५ आणि बकूबकार, हेरेश, गालाल,
आणि मतन्या बिन मीखा, बिन जिख्री, बिन आसाफ;
१६ आणि ओबद्या बिन शमाया, बिन गालाल, बिन
यदूथून; आणि बेरेख्या बिन आसा, बिन एल्काना;
हा नटोफाथी यांच्या वस्तींत राहत असे. १७ द्वार-
पाळांपैकीं हे: शल्लूम, अक्कूब, टल्मोन, अहीमान, व
त्यांचे भाऊबंद; शल्लूम हा त्यांचा प्रमुख होता;
१८ हे हा काळपावेतों पूर्वेस राजाच्या देवडीवर
देवडीवाल्यांचें काम करीत असत; लेव्यांच्या छावणीचे
द्वारपाळ हेच होते. १९ आणि शल्लूम बिन कोरे,
बिन एब्यासाफ, बिन कोरह, आणि त्याच्या पितृ-
कुळांतील त्याचे भाऊबंद जे कोरही त्यांची उपा-
सनेच्या कामावर नेमणूक असून ते दर्शनमंडपाचे
द्वारपाळ असत; त्यांचे वाडवडील परमेश्वराच्या छावणी-
वरील कामदार असून द्वारपाळ असत; २० पूर्वीच्या
काळीं फिनहास बिन एलाजार हा त्यांचा सरदार असे;
परमेश्वर त्यांच्याबरोबर असे. २१ जखऱ्या बिन
मशेलेम्या हा दर्शनमंडपाचा द्वारपाळ होता. २२ सर्व
द्वारपाळांच्या कामासाठीं दोनशें बारा लोक निवडिले
होते. त्यांस दावीद व शमुवेल द्रष्टा यांनीं ह्या
कामगिरीवर नेमिलें होतें. त्यांच्या त्यांच्या गांवीं
त्यांच्या वंशावळींत त्यांस नमूद केलें होतें. २३ ते
व त्यांचे वंशज परमेश्वराच्या मंदिराच्या म्हणजे
दर्शनमंडपाच्या द्वारपाळांचें काम पाळीपाळीनें पाहत
असत. २४ द्वारपाळ पूर्वे, पश्चिम, उत्तर व दक्षिण

अशा चारहि दिशांस असत. २५ त्यांचे भाऊबंद जे खेड्यापाड्यांत राहत असत ते सात सात दिवसांनीं पाळीपाळीनें त्यांजकडे येत; २६ चाऱ्ही मुख्य द्वारपाळ लेवी असून त्यांकडे हें काम सोंपलें होतें; त्यांस देवाच्या मंदिराच्या कोठड्या व भांडारें यांवर नेमिलें होतें. २७ देवाच्या मंदिराचें रक्षण त्यांजकडे सोंपलें असल्यामुळें ते त्याच्या आसपास रात्रीचे राहत, आणि दररोज सकाळीं मंदिर उघडण्याचें काम त्यांचें होतें. २८ उपासनेसंबंधाचीं पात्रें त्यांच्यापैकीं कांहीं जणांच्या ताब्यांत असत; तीं पात्रें ते एकेक मोजून आंत ठेवीत व एकेक मोजून बाहेर काढीत. २९ त्यांच्यापैकीं कांहीं जणांकडे सामानसुमान, पवित्रस्थानांतील सर्व पात्रें, सपीठ, द्राक्षारस, तेल, ऊद व सुगंधी द्रव्यें यांची व्यवस्था असे. ३० याजकपुत्रांपैकीं कांहीं जण गंध्याचें काम करीत. ३१ तव्यावर ज्या वस्तु भाजण्यांत येत त्यांवर देखरेख करण्यासाठीं लेव्यांपैकीं मत्तिथ्या यास नेमिलें होतें, हा शल्लूम कोरहीचा ज्येष्ठ पुत्र. ३२ कहाथी कुळांतील त्यांच्या कित्येक भाऊबंदांची नेमणूक समर्पित भाकरीसंबंधाच्या कामावर झाली होती; ते प्रत्येक शब्बाथ दिवशीं त्या तयार करीत. ३३ वर सांगितलेले गायक लेव्यांच्या पितृकुळांतले प्रमुख होते; ते कोठड्यांत राहत; त्यांना इतर कांहीं काम नसे; ते रात्रंदिवस आपल्या कामांत गुंतलेले असत. ३४ हे त्यांच्या त्यांच्या पिढ्यांतले, लेव्यांच्या पितृकुळांतले प्रमुख पुरुष होत; ते यरुशलेमांत राहत.

३५ गिबोनांत गिबोनाचा बाप ईयेल राहत होता; याच्या बायकोचें नांव माका; ३६ आणि त्याचे पुत्रः ज्येष्ठ अब्दोन, सूर, कीश, बाल, नेर, नादाब, ३७ गदोर, अह्यो, जखऱ्या व मिक्लोथ. ३८ मिक्लोथास शिमाम झाला; हेहि यरुशलेमांत आपल्या भाऊबंदांजवळ त्यांच्यासमोर राहत असत. ३९ नेरास कीश झाला, कीशास शौल झाला, शौलास योनाथान, मलकीशुवा, अबीनादाब, एश्बाल हे झाले. ४० योनाथनाचा पुत्र मरीब्बाल; मरीब्बालास मीखा झाला. ४१ मीखाचे पुत्र पीथोन, मेलेख, व तहरेया. ४२ आहाजास यारा झाला, यारास आलेमेथ, अजमावेथ व जिम्री हे झाले, जिम्रीस मोसा झाला. ४३ मोसास बिना झाला, त्याचा पुत्र रफाया, त्याचा पुत्र एलासा, त्याचा पुत्र आसेल; ४४ आणि आसेलास सहा पुत्र झाले, त्यांचीं नांवें हीं: अज्रीकाम, बोखरू, इश्माएल, शाऱ्या, ओबद्या व हानान, हे आसेलाचे पुत्र.

१० १ पलिष्टी इस्राएलाशीं लढले तेव्हां इस्राएल लोक पलिष्ट्यांपुढून पळून गेले व गिलबोवा डोंगरांत घायाळ होऊन पडले. २ पलिष्ट्यांनीं शौलाचा व त्याच्या पुत्रांचा निकरानें पाठलाग करून शौलाचे पुत्र योनाथान, अबीनादाब व मलकीशुवा यांस वधिलें. ३ शौलाशींहि लढाई फार निकराची झाली; तिरंदाजांनीं त्यास गांठिलें व त्यांच्यामुळें तो फार हैराण झाला. ४ तेव्हां शौल आपल्या शस्त्रवाहकास म्हणाला, आपली तरवार उपसून मला भोंसक; तसें न केल्यास हे असुंती लोक येऊन माझी विटंबना करितील. पण त्याचा शस्त्रवाहक तसें करीना, तो फार घाबरला होता; तेव्हां शौल आपली तरवार काढून तिच्यावर पडला. ५ शौल मेला हें पाहून त्याचा शस्त्रवाहकहि आपल्या तरवारीवर पडून त्याजबरोबर मेला. ६ याप्रमाणें शौल व त्याजबरोबर त्याचे तिघे पुत्र व त्याच्या घरचीं माणसें मृत्यु पावलीं. ७ खोऱ्यांत असलेल्या सर्व इस्राएल लोकांनीं पाहिलें कीं लढवय्ये पळाले आणि शौल व त्याचे पुत्र मरण पावले, तेव्हां तेहि आपआपलीं नगरें सोडून पळाले आणि पलिष्टी लोक त्यांत जाऊन राहिले.

८ दुसऱ्या दिवशीं पलिष्टी लोक वधलेल्यांस लुटावयास आले तेव्हां शौल व त्याचे तिघे पुत्र गिलबोवा डोंगरांत पडलेले त्यांस आढळले. ९ तेव्हां त्यांनीं शौलास नागवून त्याचें शिर व चिलखत हीं काढून घेतलीं आणि तीं आपल्या देशांत सर्वत्र पाठवून आपल्या मूर्तींस व लोकांस हें वर्तमान कळविलें. १० त्यांनीं

त्याचीं हत्यारें आपल्या देवळांत ठेविलीं व त्याचें शिर
दागोनाच्या देवळांत टांगिलें. ११ पलिष्टयांनीं शौलाचें
जें कांहीं केलें तें सगळें याबेश-गिलादाच्या सर्व
रहिवाश्यांनीं ऐकलें, १२ तेव्हां तेथले सर्व शूर वीर
निघाले आणि त्यांनीं शौल व त्याचे पुत्र यांचीं प्रेतें
याबेश येथें आणिलीं व त्यांच्या अस्थि घेऊन याबेशां-
तील एका वृक्षाखालीं पुरिल्या आणि सात दिवस
उपास केला. १३ शौलानें परमेश्वराचा अपराध केला,
परमेश्वराचा शब्द मानिला नाहीं आणि परमेश्वरास प्रश्न
करण्याऐवजीं भूतविद्याप्रवीण स्त्रियेचा त्यानें सल्ला घेतला,
१४ या सर्वांमुळें तो मेला; परमेश्वरानें त्यास मारिलें
आणि इशायाचा पुत्र दावीद यास राज्य बहाल केलें.

**११** १ मग सर्व इस्राएल लोक हेब्रोन येथें
दाविदाकडे जमा होऊन म्हणूं लागले, पाहा,
आम्ही आपल्या हाडामांसाचे आहों; २ गतकाळीं
शौल आम्हांवर राजा असतां इस्राएलांची नेआण
करणारे अग्रणी आपणच होतां; आणि आपला देव परमेश्वर
आपणाला म्हणाला होता कीं माझी प्रजा इस्राएल यांचा
मेंढपाळ व अधिपति तूंच होशील. ३ या प्रकारें
इस्राएल लोकांचे सर्व वडील जन हेब्रोनांत राजाकडे
आले, आणि दाविदानें त्यांच्याशीं परमेश्वरासमोर
हेब्रोनांत करार केला, आणि परमेश्वरानें शमुवेलाच्या
द्वारें सांगितलें होतें त्या वचनानुसार त्यांनीं दाविदास
अभिषेक करून इस्राएलाचा राजा नेमिलें. ४ नंतर
दावीद व सर्व इस्राएल लोक यरुशलेमास गेले ( यालाच
यबूस असें म्हणतात ); त्या देशचे रहिवासी यबूसी
लोक तेथें राहत असत. ५ यबूस येथल्या रहिवाश्यांनीं
दाविदास सांगितलें कीं तूं येथें येऊं नको. तथापि
दाविदानें सीयोन नांवाचा गड सर केला; त्यालाच
दावीदपुर म्हणतात. ६ दावीद म्हणाला, जो कोणी
सर्वांच्या आधीं यबूसी लोकांस मार देईल तो मुख्य
सेनापति होईल. सरूवेचा पुत्र यवाब हा प्रथम
चढाई करून गेला म्हणून त्यास सेनापति केलें.
७ दावीद त्या गडांत राहूं लागला म्हणून त्याचें
नांव दावीदपुर पडलें. ८ त्यानें नगराला चोहोंकडून
म्हणजे मिल्लोपासून समोवार कोट बांधिला; आणि
यवाबानें बाकीच्या नगराचा जीर्णोद्धार केला. ९ दावीद
अधिकाधिक थोर होत गेला, कारण सेनाधीश परमेश्वर
त्याच्याबरोबर असे.

१० इस्राएलविषयीं परमेश्वर बोलला होता तदनु-
सार दाविदाच्या ज्या शूर वीरांनीं त्याच्या पक्षाचे
होऊन त्याला गादी मिळवून देण्याची कुमक केली ते
प्रमुख पुरुष हे होत; ११ दाविदापाशीं असलेल्या
शूर वीरांचीं नांवें हीं: हखमोन्याचा पुत्र याशबाम हा
तिसांचा नायक असून त्यानें तीनशें लोकांवर भाला
चालवून त्यांस एका प्रसंगीं मारून टाकिलें. १२ त्याच्या
खालोखाल अहोही दोदय याचा पुत्र एलाजार हा
होता; तो तिघां महावीरांपैकीं एक होता. १३ तो
पस-दम्मीम येथें दाविदापाशीं होता; तेथें पलिष्टयांनीं
एकत्र होऊन जवाच्या एका शेतांत सैन्यव्यूह
रचिला तेव्हां लोक पलिष्टयांसमोरून पळून गेले;
१४ त्यांनीं त्या शेतामध्यें उभें राहून त्याचें रक्षण
करून पलिष्टयांचा संहार केला; त्या प्रसंगीं परमेश्वरानें
त्यास मोठा विजय प्राप्त करून देऊन त्यांचा बचाव
केला. १५ मग त्या तीस नायकांतले तिघे अग्रणी
दाविदाकडे अदुल्लाम गुहेंत गेले; तेव्हां पलिष्टयांचें
सैन्य रेफाईम खोऱ्यांत छावणी करून होतें. १६ त्या
प्रसंगीं दावीद गडावर असून बेथलहेमांत पलिष्टयांचें
ठाणें बसलें होतें. १७ दाविदास उत्कट इच्छा होऊन
तो म्हणाला, बेथलहेमाच्या वेशीजवळील विहिरीचें
पाणी मला कोणी पाजील तर बरें. १८ त्या तिघांनीं
पलिष्टयांच्या छावणींत घुसून बेथलहेमाच्या वेशीजवळील
विहिरीचें पाणी काढून दाविदाकडे आणिलें; पण तो
तें पिईना. त्यानें तें परमेश्वराच्या नामानें ओतिलें.
१९ तो म्हणाला, हे माझ्या देवा, असें कृत्य माझ्या-
कडून न घडो; जे आपल्या प्राणांवर उदार झाले
त्यांचें हें रक्त मीं प्यावें काय? कारण त्यांनीं आपला
जीव धोक्यांत घालून हें आणिलें आहे. यास्तव तो तें

१. पाठभेद: नायकांचा नायक. २. १ शमुवेल १७:१ येथें अफस-दम्मीम.

पिईना. त्या तिघां वीरांनीं हें कृत्य केलें. २० यवाबाचा भाऊ अबीशय हा त्या तिघांचा प्रमुख होता; त्यानें आपला भाला तीनशें मनुष्यांवर चालवून त्यांस ठार केलें; त्या तिघांमध्यें त्यानें नांव मिळविलें. २१ त्या तिघांमध्यें त्याची महती विशेष होती म्हणून तो त्यांचा नायक झाला; तरी तो पहिल्या तिघांच्या योग्यतेस पोहंचला नाहीं. २२ कबसेल येथला एक मनुष्य होता; त्यानें पुष्कळ पराक्रम केले होते; त्याच्या यहोयादा नांवाच्या पुत्राचा बनाया म्हणून एक पुत्र होता, त्यानें मवाबी अरीएल याच्या दोघां पुत्रांस ठार मारिलें आणि बर्फाच्या दिवसांत कूपांत उतरून एका सिंहास ठार केलें; २३ मग त्यानें पांच हात उंचीच्या एका धिप्पाड मिसरी पुरुषास ठार केलें; त्या मिसऱ्याच्या हातीं साळ्याच्या तुरीसारखा एक भाला होता; पण बनाया केवळ एक काठी घेऊन त्याच्यावर चालून गेला व त्यानें त्या मिसऱ्याच्या हातचा भाला हिसकावून घेऊन त्या भाल्यानें त्याचा वध केला. २४ असें करून यहोयादाचा पुत्र बनाया यानें त्या तिघां वीरांमध्यें नांव मिळविलें. २५ पाहा, त्या तिसांहून त्याची महती विशेष होती तरी पहिल्या तिघांच्या योग्यतेस तो पोहंचला नाहीं; दाविदानें त्यास आपल्या हुजरातीवर नेमिलें. २६ सैन्यांतील वीर हे: यवाबाचा भाऊ असाएल, बेथलेहेमच्या दोदोचा पुत्र एलहानान, २७ शम्मोथ हरोरी, हेलस पलोनी, २८ इक्केश तकोइ याचा पुत्र ईरा, अबियेजेर अनाथोथी, २९ सिब्बखाय हूशाथी, ईलाय अहोही, ३० महरय नटोफाथी, बाना नटोफाथी याचा पुत्र हेलेद, ३१ बन्यामिन्यांच्या गिबांतला रीबय याचा पुत्र इत्तय, बनाया पिराथोनी, ३२ गाशाच्या ओढ्यांजवळचा हूरय, अबीएल अर्बाथी, ३३ अजमावेथ बहरूमी, अलीहबा शालबोनी, ३४ गिजोनकर हाशेमाचे पुत्र, हरारी शागे याचा पुत्र योनाथान, ३५ हरारी साखार याचा पुत्र अहीयाम, ऊराचा पुत्र अलीफल, ३६ हेफेर मखेराथी, अहीया पलोनी, ३७ हेस्रो कर्मेली, एजबयाचा पुत्र नारय, ३८ नाथानाचा भाऊ योएल, हग्रीचा पुत्र मिभार, ३९ सेलक अम्मोनी, सरूवेचा पुत्र यवाब याचा शस्त्रवाहक नहरय बैरोथी, ४० ईरा इथ्री, गारेब इथ्री, ४१ उरीया हित्ती, अहल्याचा पुत्र जाबाद, ४२ रउबेनी शीजा याचा पुत्र अदीना, हा रउबेन्यांचा सरदार, त्याच्याबरोबर तीस जण असत, ४३ माकाचा पुत्र हानान, योशाफाट मिथनी, ४४ उज्जीया अष्टराथी, होथाम अरोएरीमाचे पुत्र शामा व ईयेल, ४५ शिम्रीचा पुत्र यदीएल व त्याचा भाऊ योहा तीसी, ४६ अलिएल महवी व एलानामाचे पुत्र यरीबय व योशव्या, इथ्मा मवाबी, ४७ अलीएल ओबेद आणि यासीएल मसोबायी.

१२ १ दावीद सिक्लाग येथें किशाचा पुत्र शौल याच्या भीतीनें लपून राहत होता त्या समयीं जे त्याजकडे आले व ज्यांनीं त्यास युद्धांत कुमक केली ते शूर वीर हे: २ ते धनुर्धारी असून उजव्याडाव्या अशा दोन्ही हातांनीं गोफणगुंडे व धनुष्यबाण मारीत असत; हे शौलाच्या भाऊबंदांपैकीं असून बन्यामिनी वंशांतले होते. ३ त्यांतला प्रमुख अहीएजर व दुसरा योवाश, हे गिबावासी शमा याचे पुत्र; तसेच अजमावेथ याचे पुत्र यजिएल, व पेलेट, बराका व अनाथोथी येहू; ४ गिबोनी इश्माया हा तिसांतला एक महावीर असून त्या तिसांवर नायक होता; आणि यिर्मया, यहजिएल, योहानान, गदेराथी, योजाबाद, ५ एलूजय, यरीमोथ, बाल्या, शमऱ्या, हरूफी शफट्या, ६ एलकाना, इश्शीया, अजरेल, योबेजर व याशबाम हे कोरहाचे वंशज; ७ आणि गदोरी यरोहामाचे पुत्र योएला व जबद्या. ८ दावीद अरण्यांतील गढींत राहत असे तेव्हां गादी लोकांतले शूर वीर, युद्धकलेंत प्रवीण, ढाल व बर्ची धारण करणारे, सिंहासारख्या मुखाचे आणि पहाडांतील हरिणांच्या वेगानें धावणारे असे आपल्या वंशांतून वेगळे होऊन दाविदाकडे आले ते हे: ९ एजेर मुख्य, ओबद्या दुसरा, अलीयाब तिसरा, १० मिश्मन्ना चवथा, यिर्मया पांचवा, ११ अत्तय सहावा, एलीएल सातवा, १२ योहानान

आठवा, एलजाबाद नववा, १३ यिर्मया दहावा आणि
मखबन्नय अकरावा. १४ हे गादी सेनानायक होते;
त्यांतला कनिष्ठ शंभरांच्या तोडीचा होता व त्यांतला
श्रेष्ठ हजारांच्या तोडीचा होता. १५ पहिल्या महिन्यांत
यार्देन नदी दुथडी भरून वाहते तेव्हां यांनींच नदीपार
जाऊन पूर्व व पश्चिम ह्या दोन दिशांकडल्या
खोऱ्यांतील लोकांस पळवून लाविलें. १६ बन्यामिनी
व यहूदी लोकांपैकींहि कांहीं लोक दाविदाकडे गढींत
गेले. १७ दावीद त्यांस सामोरा जाऊन म्हणाला,
तुम्ही केवळ मित्रभावानें कुमक करण्यास मजकडे आलां
असल्यास माझें मन तुम्हांशीं जडून राहील; पण तुम्ही
माझ्याशीं दगा करून मला शत्रूंच्या हातीं देण्यासाठीं
आलां असल्यास आपल्या पूर्वजांचा देव हें पाहून
तुम्हांस शासन करो, कारण माझ्या हातून कांहीं
उपद्रव झालेला नाहीं. १८ मग त्या तिसांतला प्रमुख
जो अमासय यास आत्म्यानें व्यापिलें व तो म्हणाला,
हे दाविदा, आम्ही आपलेच आहों; इशायपुत्रा, आम्ही
आपल्या पक्षाचे आहों; आपलें कुशल असो, कुशल असो;
आपल्या साहाय्यकर्त्यांचेंहि कुशल असो; कारण आपला देव
आपला साहाय्यकारी आहे. यावर दाविदानें त्यांस ठेवून
घेतलें व आपल्या सैन्यावर नायक नेमिलें. १९ मन-
श्शांतलेंहि कांहीं लोक दाविदास येऊन मिळाले;
त्या समयीं तो पलिष्ट्यांस मिळून शौलाशीं युद्ध करण्यास
गेला होता, पण त्यानें पलिष्ट्यांस साहाय्य केलें
नाहीं, कारण पलिष्ट्यांच्या सरदारांनीं आपसांत सल्ला
करून त्यास लावून दिलें; ते म्हणाले, तो आमचीं शिरें
जोखमांत घालून आपला स्वामी शौल यास पुनः
जाऊन मिळावयाचा. २० तो सिक्लाग येथें गेला तेव्हां
मनश्शांतले अदनाह, योजाबाद, यदीएल, मीखाएल,
योजाबाद, अलीहू, सिलथय हे मनश्शाचे सहस्रपति
फितून त्याजकडे गेले. २१ त्यांनीं लुटारूंच्या टोळी-
पासून दाविदाचें रक्षण केलें; ते सर्व शूर वीर असून
सेनानायक होते. २२ दररोज लोक दाविदाची
कुमक करण्यासाठीं त्यास येऊन मिळत; शेवटीं त्याची
देवाच्या सेनेसारखी मोठी सेना बनली.

२३ परमेश्वराच्या वचनानुसार शौलाचें राज्य
दाविदाच्या हातीं यावें म्हणून जे लोक युद्ध करण्यासाठीं
हत्यारबंद होऊन हेब्रोन येथें त्याजकडे आले त्यांच्या
प्रमुखांची गणती ही: २४ यहूदी लोकांतले ढालबर्ची
धारण करणारे, लढावयास हत्यारबंद झालेले लोक
सहा हजार आठशें, २५ शिमोनी वंशांतले लढाईस
सिद्ध झालेले शूर वीर सात हजार शंभर; २६ लेव्यांतले
चार हजार सहाशें इतके होते. २७ अहरोन घराण्याचा
नायक यहोयादा होता, त्याच्याबरोबर तीन हजार
सातशें लोक होते; २८ सादोक नांवाचा एक तरुण
महावीरहि आला; त्याजबरोबर त्याच्या बापाच्या घराण्यां-
तले बावीस सेनानायक आले. २९ शौलाचे भाऊ-
बंद बन्यामिनी यांपैकीं तीन हजार आले; कारण हा
वेळपावेतों बहुतेक बन्यामिनी लोक शौलाच्या घराण्यास
धरून होते. ३० एफ्राइमी लोकांतले महावीर जे आप-
आपल्या पितृकुळांतील नामांकित पुरुष होते ते वीस
हजार आठशें आले. ३१ मनश्शाच्या अर्ध्या वंशांतले
अठरा हजार लोक दाविदास राजा करण्यास आले;
त्यांचीं नांवें नोंदण्यांत आलीं. ३२ कालप्रवृत्ति ओळखून
इस्राएलानें काय करावें हें ज्यांना कळत होतें असे इस्साखार
वंशांतील दोनशें नायक आले; त्यांचे सर्व भाऊबंद
त्यांच्या आज्ञेंत होते. ३३ युद्धाच्या सर्व प्रकारच्या
हत्यारांनीं सज्ज होऊन सैन्याचा व्यूह रचून चालून
जाणारे जबुलून वंशांतले पन्नास हजार योद्धे आले;
त्यांस व्यूहरचना चांगली करितां येत असून त्यांचें
मन दुटप्पी नसे. ३४ नफताली वंशांतले सेनानायक एक
हजार व त्यांजबरोबर ढाल व भाला धारण करणारे
सदतीस हजार आले. ३५ सैन्याची व्यूहरचना
करणारे दान वंशांतले अठ्ठावीस हजार सहाशें योद्धे
आले. ३६ सैन्याची व्यूहरचना करणारे व सैन्याबरोबर
लढाईस जाणारे आशेर वंशांतले चाळीस हजार योद्धे
आले. ३७ यार्देनेच्या पूर्वेस राहणारे रऊबेनी, गादी
व मनश्शाचा अर्धा वंश यांतले एक लक्ष वीस हजार
लोक युद्धाच्या सर्व प्रकारच्या हत्यारांनीं सज्ज होऊन
आले. ३८ हे सर्व व्यूहरचना करणारे योद्धे दाविदास

सर्व इस्राएलांचा राजा करावें म्हणून हेब्रोन
येथें खऱ्या मनानें आले; दाविदास राजा करावें
म्हणून बरकड सर्व इस्राएल लोकहि एकदिल झाले.
३९ ते तेथें तीन दिवस दाविदाबरोबर खातपीत
राहिले, कारण त्यांच्या भाऊबंदांनीं त्यांच्यासाठीं
सर्व सामग्री तयार केली होती. ४० याखेरीज
त्यांच्या आसपास जे राहत होते म्हणजे इस्साखार,
जबुलून व नफताली या प्रांतांपर्यंत जे राहत होते
त्यांनीं भाकरीचें पीठ, अंजिरांच्या ढेपा; खिसमिसांचे
घड, द्राक्षारस, तेल आदिकरून भोजनवस्तु, गाढवें,
उंट, खेचरें, व बैल यांवर लादून आणिल्या;
त्याप्रमाणेंच त्यांनीं बैल व शेरडेंमेंढरें अपरिमित आणिलीं,
कारण इस्राएलांत उत्सव चालला होता.

१ दाविदानें सहस्रपति व शतपति यांपैकीं
**१३** प्रत्येक नायकाचा सल्ला घेतला. २ दावीद
इस्राएलाच्या सर्व मंडळीस म्हणाला, तुम्हांस
ठीक वाटत असेल आणि आपला देव परमेश्वर याची
मर्जी तशी असेल तर इस्राएलाच्या सर्व प्रदेशांत जे
आपले बाकीचे भाऊबंद आहेत त्यांस आणि नगरांत
व त्यांच्या आसपासच्या खेड्यापाड्यांत जे याजक व
लेवी राहत आहेत त्यांस निरोप पाठवूं कीं त्यांनीं
आपल्याला येऊन मिळावें, ३ आणि आपल्या देवाचा
कोश आपणांकडे परत आणावा, कारण शौलाच्या
कारकीर्दीत आम्ही त्याकडे जाऊन प्रश्न करीत
नव्हतों. ४ मंडळीच्या सर्व लोकांस ही गोष्ट रुचली
व ते म्हणाले, आपण हें करूं. ५ तेव्हां देवाचा कोश
किर्याथ-यारीम येथून आणावा म्हणून मिसरच्या
शीहोर नाल्यापासून हमाथ घाटापर्यंत सर्व इस्राएल
दाविदानें एकवट केले. ६ करूबारूढ असलेला परमेश्वर
देवाच्या नामाचा कोश आणावा म्हणून दावीद व
सर्व इस्राएल यहूदांतलें बाला ऊर्फ किर्याथ-यारीम येथें
गेले. ७ त्यांनीं देवाचा कोश, अबीनादाबाच्या घरांतून
काढून एका नव्या गाडीवर ठेविला; उज्जा व अह्यो गाडी
हाकीत होते. ८ दावीद व सर्व इस्राएल लोक देवा-
समोर जिवेंभावें गीत गात आणि वीणा, सारंगी, डफ,
झांजा व करणे वाजवीत चालले. ९ ते कीदोनाच्या
खळ्यानजीक आले तेव्हां बैलांनीं ठोकर खाल्ली म्हणून
उज्जानें कोश धरावयाला आपला हात पुढें केला.
१० तेव्हां उज्जावर परमेश्वराचा कोप भडकला; त्यानें
आपला हात कोशास लाविला म्हणून देवानें त्यास
ताडण केलें व तो त्याच्यापुढें गतप्राण झाला;
११ परमेश्वरानें उज्जाला दणका दिला म्हणून दावीद
फार खिन्न झाला, त्यानें त्या ठिकाणाचें नांव पेरेस-उज्जा
(उज्जा-हनन) ठेविलें, तें आजवर चालत आहे.
१२ त्या दिवशीं दाविदास देवाचा धाक वाटून तो
म्हणाला, देवाचा कोश माझ्या घरीं कसा आणावा?
१३ दाविदानें तो कोश आपल्या येथें दावीदपुरीं
नेला नाहीं, तर ओबेद-अदोम गित्ती याच्या घरीं
एकीकडे नेऊन ठेविला. १४ देवाचा कोश ओबेद-
अदोम याच्या घरीं तीन महिने राहिला; परमेश्वरानें
ओबेद-अदोमाचें घराणें व त्याचें सर्वस्व यांस
बरकत दिली.

१ सोरेचा राजा हीराम यानें दाविदाकडे
**१४** जासूद पाठविले; आणखी त्यानें गंधसरूचें
लाकूड, गवंडी व सुतार दाविदासाठीं मंदिर
बांधावयास पाठविले. २ परमेश्वरानें इस्राएलवरील
आपलें राज्य स्थिर केलें आणि आपल्या इस्राएली
प्रजेप्रीत्यर्थ आपल्या राज्याची उन्नति केली हें
दाविदाच्या ध्यानांत आलें.
३ दाविदानें यरुशलेम येथें आणखी बायका केल्या;
त्याला आणखी पुत्र व कन्या झाल्या. ४ यरुशलेम येथें
त्यास पुत्र झाले त्यांचीं नांवें हीं: शम्मुवा, शोबाब,
नाथान, शलमोन, ५ इभार, अलीशवा, एल्पलेट,
६ नोगा, नेफेग, याफीय, ७ अलीशामा, बेल्यादा
व अलीफलेट.
८ दाविदाला अभिषेक करून इस्राएलाचा राजा
केलें आहे हें ऐकून सर्व पलिष्टी त्याच्या शोधास
निघाले; हें ऐकून त्याजशीं सामना करावयास
दावीद निघाला. ९ पलिष्ट्यांनीं येऊन रेफाईम खोऱ्या-
वर घाला घातला. १० दाविदानें देवास प्रश्न केला

की मी पलिष्ट्यांवर चढाई करूं काय? तूं त्यांस माझ्या
हातीं देशील काय? परमेश्वरानें दाविदास म्हटलें,
चढाई कर, मी त्यांस तुझ्या हातीं देईन. ११ ते बाल-
परासीम येथें आले; तेथें दाविदानें त्यांचा संहार
केला; तो म्हणाला, देव पाण्याच्या लोंढ्याप्रमाणें
माझ्या शत्रूंवर माझ्या हस्तें तुटून पडला; यावरून
त्या ठिकाणाचें नांव बाल-परासीम (तुटून पडण्याचें
ठिकाण) असें पडलें. १२ तेथें पलिष्टी आपलीं
दैवतें टाकून गेले; तेव्हां दाविदाच्या आज्ञेनें तीं जाळून
टाकिलीं. १३ मग पुनरपि पलिष्ट्यांनीं त्या खोऱ्यावर
हल्ला केला. १४ दाविदानें देवास पुनः प्रश्न केला
असतां देवानें त्यास सांगितलें कीं त्यांच्या वाटेस
जाऊं नको, तर वळसा घेऊन तुतीच्या झाडांसमोर
त्यांच्यावर छापा घाल. १५ तुतीच्या झाडांच्या
शेंड्यांमधून सेना कूच करीत आहे असा आवाज
तुझ्या कानीं पडतांच युद्धासाठीं पुढें चाल करून,
कारण पलिष्ट्यांच्या सेनेचा संहार करण्यासाठीं देव
तुझ्या अग्रभागीं गेला आहे असें समज. १६ देवाच्या
आज्ञेप्रमाणें दाविदानें केलें आणि गिबोनापासून
गेजेरापर्यंत तो पलिष्ट्यांच्या सैन्यास मार देत गेला.
१७ दाविदाची कीर्ति देशोदेशीं पसरली; परमेश्वरानें
सर्व राष्ट्रांवर त्याचा धाक बसविला.

१५
१ दाविदानें दाविदपुरांत आपल्यासाठीं
महाल बांधिले व देवाच्या कोशासाठीं एक स्थान
सिद्ध करून एक तंबू ठोकिला. २ दाविदानें
सांगितलें कीं लेव्यांवांचून दुसऱ्या कोणीहि देवाचा
कोश उचलूं नये; कारण देवाचा कोश उचलण्यास व
देवाची सेवा निरंतर करण्यास त्यांस परमेश्वरानें निव-
डिलें आहे. ३ परमेश्वराच्या कोशासाठीं जें स्थान त्यानें
तयार केलें होतें तेथें तो न्यावा म्हणून दाविदानें सर्व
इस्राएलांस यरुशलेमांत एकवट केलें. ४ त्याप्रमाणेंच
दाविदानें अहरोनाचे वंशज व लेवी यांस एकवट केलें.
५ कहाथी वंशांतला प्रमुख उरीयेल व त्याचे भाऊबंद
एकशें वीस; ६ मरारीच्या वंशजांतला मुख्य असाया व
त्याचे भाऊबंद दोनशें वीस; ७ गर्षोमाच्या वंशजांतला
मुख्य योएल व त्याचे भाऊबंद एकशें तीस; ८ अली-
साफानाच्या वंशजांतला मुख्य शमाया व त्याचे भाऊबंद
दोनशें; ९ हेब्रोनाच्या वंशजांतला मुख्य अलीएल व
त्याचे भाऊबंद ऐशीं; १० उज्जियेलाच्या वंशजांतला
मुख्य अम्मीनादाब व त्याचे भाऊबंद एकशें बारा:
११ दाविदानें सादोक, अब्याथार याजक, उरिएल,
असाया, योएल, शमाय, अलीएल व अम्मीनादाब या
लेव्यांस बोलावून आणून सांगितलें कीं १२ तुम्हीं
लेव्यांच्या पितृकुळांतील प्रमुख पुरुष आहां; तुम्ही
आपल्या भाऊबंदांसह शुचिर्भूत व्हा व मग इस्राएलाचा
देव परमेश्वर याच्या कोशासाठीं जें स्थळ मीं तयार केलें
आहे तेथें तो नेऊन पोंचवा. १३ पूर्वीच्या प्रसंगीं
तुम्हीं तो वाहून आणिला नाहीं, आणि आपण आपला
देव परमेश्वर यास विधीप्रमाणें भजलों नाहीं म्हणून
त्यानें आपल्याला तडाका दिला. १४ यावरून याजक
व लेवी हे इस्राएलाचा देव परमेश्वर याचा कोश
घेऊन जाण्यासाठीं शुचिर्भूत झाले. १५ मोशानें परमे-
श्वराच्या सांगण्यावरून आज्ञा केली होती तिला अनुसरून
लेव्यांनीं त्या कोशास लाविलेल्या काठ्या आपल्या
खांद्यांवर घेऊन कोश वाहिला. १६ दाविदानें
लेव्यांच्या प्रमुखांस आज्ञा केली कीं सतार, वीणा
व झांजा अशीं वाद्यें वाजवून आनंदानें उच्चस्वरें गायन
करितील असे तुमच्या भाऊबंदांतले गायक नेमा.
१७ तेव्हां लेव्यांनीं हेमान बिन योएल आणि त्याच्या
भाऊबंदांपैकीं आसाफ बिन बरेख्या व त्यांचे बांधव
मरारीवंशज यांच्यांतला एथान बिन कुशाया यांस
नेमिलें; १८ आणि त्यांचे भाऊबंद जखऱ्या, बेन,
यजीएल, शमीरामोथ, यहीएल, उन्नी, अलीयाब,
बनाया, मासेया, मत्तिथ्या, अलीफलेहू, मिकनेया,
ओबेद-अदोम व ईयेल हे जे द्वारपाळ होते त्यांस
दुय्यम दर्जाचे नेमिलें. १९ हेमान, आसाफ व एथान
या गवयांस पितळेच्या झांजा वाजवून गजर करावयास
नेमिलें; २० आणि जखऱ्या, अजीएल, शमीरामोथ, यही-
एल, उन्नी, अलीयाब, मासेया व बनाया यांस अलामोथ

१ टिपेच्या सुरानें म्हणजे वरल्या सुरानें.

या रागावर सारंगी वाजवावयास नेमिलें; २१ आणि
मत्तिथ्या, अलीफलेहू, मिकनेया, ओबेद-अदोम, ईयेल,
व अजज्या यांस शमीनीथें सुरावर वीणा वाजवा-
वयास नेमिलें. २२ कनन्या लेव्यांचा मुख्य
गायक होता; तो रागरागिणींची तालीम देत असे,
कारण त्या कामीं तो निपुण होता. २३ बरेख्या व
एल्काना हे कोशाचे द्वारपाळ होते. २४ शबन्या,
योशाफाट, नथानेल, अमासय, जखऱ्या बनाया व
अलियेजर हे याजक देवाच्या कोशापुढें करणे
वाजवीत; ओबेद-अदोम व यहीया हे कोशाचे द्वारपाळ
होते. २५ दावीद, इस्राएलाचे वडील जन व सहस्रपति
हे सर्व एकत्र होऊन परमेश्वराच्या कराराचा कोश
ओबेद-अदोम याच्या घरून मोठ्या उत्साहानें घेऊन
येण्यासाठीं तिकडे गेले. २६ देवानें परमेश्वराच्या
कराराचा कोश वाहून न्यावयास लेव्यांस साहाय्य केलें
तेव्हां त्यांनीं सात बैल व सात मेंढे यांचा यज्ञ केला.
२७ दावीद, कराराचा कोश वाहणारे सर्व लेवी, गायक
व मुख्य गायक कनन्या या सर्वांनीं तलम सणाचे झगे
परिधान केले होते; दाविदानें तागाचें एफोद घातलें
होतें. २८ या प्रकारें सगळ्या इस्राएल लोकांनीं परमे-
श्वराच्या कराराचा कोश जयजयकार करीत, रणशिंग,
करणा व झांजा वाजवीत आणि सतार व वीणा यांचा
नाद काढीत समारंभानें वर आणिला. २९ परमेश्वराच्या
कराराचा कोश दावीदपुरांत येत असतां शौलाची
कन्या मीखल हिनें खिडकींतून डोकावून दावीद राजा
नाचत व बागडत आहे हें पाहिलें, तेव्हां तिच्या
मनाला त्याचा वीट आला. १ लोकांनीं देवाचा
१६ कोश आणून त्यासाठीं दाविदानें तयार
केलेल्या तंबूंत तो नेऊन ठेविला, व त्यांनीं देवापुढें
होमबलि व शांत्यर्पणें अर्पिलीं. २ दाविदानें होमबलि
व शांत्यर्पणें यांची समाप्ति केल्यावर परमेश्वराच्या
नामानें लोकांस आशीर्वाद दिला. ३ त्यानें इस्रा-
एलाच्या प्रत्येक स्त्रीपुरुषास एकएक भाकर, एक-
एक मांसाचा तुकडा व खिसमिसांची एकएक ढेप
अशीं वांटून दिलीं.

४ मग दाविदानें परमेश्वराच्या कोशापुढें सेवा-
चाकरी करण्यास आणि इस्राएलाचा देव परमेश्वर
याचा गुणानुवाद व उपकारस्मरण करण्यास कांहीं
लेवी नेमिले; ५ प्रमुख आसाफ व त्याचे दुय्यम
जखऱ्या, यहएल, शमिरामोथ, यहिएल, मत्तिथ्या,
अलीयाब, बनाया, ओबेद-अदोम व ईयेल हे सतार
व वीणा वाजवीत असत आणि आसाफ झांज
वाजवीत असे; ६ आणि बनाया व याहजिएल हे
याजक देवाच्या कराराच्या कोशापुढें नित्य करणे
वाजवीत असत.

७ त्या दिवशीं प्रथम दाविदानें परमेश्वराचें स्तोत्र
म्हणण्याचें काम आसाफ व त्याचे बांधव यांस सांगितलें;
तें स्तोत्र हें :

८ परमेश्वराचें उपकारस्मरण करा, त्याचें नाम घ्या;
राष्ट्रांस त्याचीं कृत्यें जाहीर करा.
९ त्याला त्याचीं स्तोत्रें गा;
त्याच्या सर्व अद्भुतकृत्यांचें वर्णन करा.
१० त्याच्या पवित्र नामाचा अभिमान बाळगा;
ज्यांना परमेश्वराचा ध्यास लागला आहे त्यांचें
हृदय हर्षित होवो.
११ परमेश्वर व त्याचें सामर्थ्य यांवर भरंवसा ठेवा;
त्याच्या दर्शनाविषयीं सदा आतुर असा.
१२ त्यानें केलेलीं अद्भुतकृत्यें, त्याचे चमत्कार,
व त्यानें उच्चारिलेले निर्णय आठवा;
१३ त्याचा सेवक इस्राएल याचे वंशजहो,
त्यानें निवडलेल्या याकोबाच्या वंशजांनो, तुम्ही
असें करा.
१४ तो परमेश्वर आमचा देव आहे;
त्याचीं न्यायकृत्यें सर्व पृथ्वीभर आहेत.
१५ त्याच्या कराराचें निरंतर स्मरण करा,
हजारों पिढ्यांसाठीं त्यानें आज्ञापिलेलें वचन
आठवा;
१६ हा करार त्यानें अब्राहामाशीं केला

१ आठव्या ( खर्ज ) नीच सुरावर. २ अथवा: कोश
वाहून नेण्याच्या कामावर होता;

आणि त्याविषयीं इसहाकापाशीं शपथ वाहिली;
१७ ती त्यानें याकोबासाठीं नियम,
इस्राएलासाठीं सर्वकाळचा करार या रूपानें कायम केली;
१८ तो म्हणाला, कनान देश
तुझा वतनभाग म्हणून तुला देईन.
१९ त्या वेळीं तुम्ही मोजके, फार थोडे होतां,
व त्या देशांत तुम्ही उपरी होतां.
२० ते राष्ट्रांराष्ट्रांतून,
एका राज्यांतून दुसऱ्या लोकांत हिंडले.
२१ त्यानें कोणत्याहि मनुष्याला त्यांस उपद्रव करूं दिला नाहीं,
त्यांजकरितां त्यानें राजांचाहि निषेध करून म्हटलें कीं
२२ माझ्या अभिषिक्तांस हात लावूं नका,
माझ्या संदेष्ट्यांस उपद्रव देऊं नका.
२३ हे सर्व पृथ्वी, परमेश्वराचीं स्तुतिस्तोत्रें गा;
त्यानें केलेल्या तारणाची घोषणा प्रतिदिनीं करा.
२४ राष्ट्रांमध्यें त्याचें गौरव,
सर्व लोकांमध्यें त्याचीं अद्भुतकृत्यें जाहीर करा.
२५ कारण परमेश्वर थोर व परमस्तुत्य आहे;
सर्व दैवतांहून त्याचेंच भय धरणें योग्य आहे.
२६ कारण राष्ट्रांचीं सर्व दैवतें निरुपयोगी आहेत;
परमेश्वर आकाशाचा निर्माणकर्ता आहे.
२७ तेज व प्रताप हीं त्याजपुढें आहेत;
सामर्थ्य व आनंद त्याच्या स्थानीं आहेत.
२८ अहो राष्ट्रकुलांनो, परमेश्वराचें गौरव करा;
परमेश्वराचें गौरव करा व त्याचें सामर्थ्य वाखाणा.
२९ परमेश्वराच्या नामाची थोरवी गा;
अर्पण घेऊन त्याच्यासमोर या;
पावित्र्यानें युक्त होऊन परमेश्वराची आराधना करा.
३० हे सर्व पृथ्वी, त्याजपुढें कंपायमान हो;
जग स्थिर स्थापिलेलें आहे, तें हलमलत नाहीं.
३१ आकाश हर्षो, पृथ्वी उल्लासो;
राष्ट्रांमधल्या लोकांस विदित करा कीं परमेश्वर राज्य करितो.
३२ समुद्र व त्यांतील सर्व कांहीं गर्जना करोत;
शेत व त्यांतील सर्व कांहीं उत्सव करोत;
३३ म्हणजे वनांतील झाडें परमेश्वरासमोर आनंदाचा गजर करितील;
कारण पृथ्वीचा न्याय करावयास तो आला आहे.
३४ परमेश्वराचें उपकारस्मरण करा, कारण तो चांगला आहे;
त्याची दया सनातन आहे
३५ असें म्हणा : हे आमच्या तारणाऱ्या देवा, आम्हांस तार;
आम्हांस राष्ट्रांतून सोडवून घेऊन एकत्र कर,
म्हणजे आम्ही तुझ्या पवित्र नामाचें उपकारस्मरण करूं,
आणि तुझ्या स्तवनांतच आम्हांस उल्लास वाटेल.
३६ इस्राएलाचा देव परमेश्वर याचा
अनादिकाळापासून अनंतकाळपर्यंत धन्यवाद होवो.
तेव्हां सर्व लोकांनीं आमेन म्हणून परमेश्वराचें स्तवन केलें.

३७ कोशापुढें दररोज गरज पडेल त्याप्रमाणें
सतत सेवा करावी म्हणून दाविदानें आसाफ व त्याचे
भाऊबंद यांस परमेश्वराच्या कराराच्या कोशासमोर राहा-
वयासाठीं नेमिलें; ३८ तसेंच ओबेद-अदोम व
त्याचे अडसष्ट भाऊबंद आणि यदूथूनाचा पुत्र ओबेद-अदोम
व होसा यांस द्वारपाळ केलें; ३९ आणखी त्यानें सादोक
याजक व त्याचे याजक भाऊबंद यांची गिबोन येथल्या
उच्च स्थानीं असलेल्या परमेश्वराच्या निवासमंडपासमोर
योजना केली; ४० त्यांनीं नित्य सकाळसंध्याकाळ
होमवेदीवर परमेश्वराप्रीत्यर्थ होम अर्पावे. अर्थात
परमेश्वरानें इस्राएलास विहित केलेल्या नियमशास्त्रांत
जें लिहिलें आहे त्या सर्वांप्रमाणें त्यांनीं करावें अशी
व्यवस्था केली. ४१ परमेश्वराची दया सनातन आहे
म्हणून त्याचा धन्यवाद करावयासाठीं त्यांजबरोबर
हेमान, यदूथून व इतर नांवें घेऊन निवडलेले लोक
होते; ४२ त्यांच्याबरोबर हेमान व यदूथून कर्णे,
झांजा व इतर वाद्यें वाजवून देवाप्रीत्यर्थ गायनवादन
करीत; यदूथूनाच्या पुत्रांस द्वारपाळ केलें. ४३ मग सर्व

लोक आपआपल्या घरीं गेले; आणि आपल्या घराण्यास
आशीर्वाद द्यावा म्हणून दावीद आपल्या घरीं गेला.

१७ १ दावीद आपल्या मंदिरांत राहूं लागला
तेव्हां त्यानें नाथान संदेष्ट्यास म्हटलें, पाहा,
मी गंधसरूच्या मंदिरांत राहत आहें, पण
परमेश्वराच्या कराराचा कोश कनाथीखालीं आहे.
२ नाथान दाविदास म्हणाला, तुझ्या मनांत जें कांहीं
असेल तें कर, कारण देव तुझ्याबरोबर आहे.
३ त्याच रात्रीं देवाचें वचन नाथानाला प्राप्त झालें तें
असें: ४ माझा सेवक दावीद यास सांग, परमेश्वर
म्हणतो, माझ्या निवासासाठीं तुला मंदिर बांधावयाचें
नाहीं. ५ ज्या दिवशीं इस्राएल लोकांस मीं मिसर
देशांतून बाहेर काढिलें तेव्हांपासून आज दिवसपर्यंत
माझा निवास कधीं मंदिरांत झाला नाहीं; डेऱ्यांतून व
मंडपांतून मी भ्रमण करीत आहें. ६ जिकडेजिकडे
मी इस्राएल लोकांसह भ्रमण करीत आलों तिकडे-
तिकडे ज्या कोणा इस्राएल शास्त्यांना माझ्या लोकांचें
पालन करण्याविषयीं मी आज्ञा करीत असें त्यांस
तुम्हीं मजसाठीं गंधसरूचें मंदिर कां बांधिलें नाहीं
असा एक शब्द तरी कधीं मी बोललों आहें काय?
७ तर आतां माझा सेवक दावीद यास सांग, सेनाधीश
परमेश्वर म्हणतो, तूं माझ्या प्रजेचा, इस्राएलाचा
अधिपति व्हावें म्हणून मीं तुला मेंढवाड्यांतून, मेंढरांच्या
मागचा आणिलें. ८ जिकडे तूं गेलास तिकडे मी तुझ्या-
बरोबर राहिलों, आणि तुझ्या सर्व शत्रूंचा तुजपुढून
उच्छेद केला; पृथ्वीवर जे थोर पुरुष आजपर्यंत
झाले आहेत त्यांच्या नांवाप्रमाणें मी तुझें नांव करीन.
९ मी आपल्या इस्राएलासाठीं एक स्थान नेमून देईन.
मी तेथें त्यांस रोवीन; म्हणजे ते आपल्या स्थानीं
वस्ती करून राहतील व तेथून पुढें कधीं ढळणार
नाहींत; १० इस्राएल लोकांवर मीं शास्ते नेमिले
होते त्यांच्या काळापासून दुर्जन जसे त्यांस त्रस्त करीत
होते तसे ते यापुढें करणार नाहींत; मीं तुझ्या सर्व
शत्रूंचा मोड केला आहे. मी तुला म्हणत आहें कीं
परमेश्वर तुझें घराणें कायमचें स्थापील. ११ तुझे
दिवस पुरे झाले व तूं जाऊन आपल्या पितरांबरोबर
निजलास म्हणजे तुझ्या पुत्रांपासून निर्माण होणाऱ्या
संततीस तुझ्यामागून स्थापून त्याचें राज्य स्थिर
करीन. १२ तो मजप्रीत्यर्थ मंदिर बांधील व मी त्याचें
राजासन निरंतरचें स्थापीन. १३ मी त्याचा पिता
होईन व तो माझा पुत्र होईल; तुझ्यापूर्वीच्या राजा-
वरची कृपादृष्टि जशी मीं दूर केली तशी त्याजवरची
माझी कृपादृष्टि मी दूर करणार नाहीं; १४ माझ्या
मंदिरांत व माझ्या राज्यांत मी त्याची निरंतरची
स्थापना करीन; त्याची गादी निरंतरची स्थापीत होईल.
१५ हीं सर्व वचनें व दर्शनें जशाचीं तशीं नाथानानें
दाविदास कळविलीं.

१६ मग दावीद राजा आंत जाऊन परमेश्वरा-
समोर बसून म्हणाला, हे परमेश्वरा देवा, मी कोण व
माझें घराणें तें काय कीं तूं मला येथवर आणिलें
आहे? १७ हे देवा, तुझ्या दृष्टीनें ही केवळ लहान
गोष्ट आहे; तूं आपल्या सेवकाच्या घराण्यासंबंधानें
पुढील बऱ्याच काळाचें सांगून ठेविलें आहे; हे परमे-
श्वरा देवा, उच्च पदावरल्या मनुष्याप्रमाणें तूं मला
लेखीत आहेस. १८ तूं आपल्या सेवकाचा जो मान
केला आहे त्याबद्दल दावीद आणखी काय बोलणार?
कारण तूं आपल्या सेवकास ओळखितोस. १९ हे परमे-
श्वरा, तुझ्या सेवकाप्रीत्यर्थ व तुझ्या मनोदयाप्रमाणें
हें महत्कार्य तूं केलें आहे; ह्या सगळ्या थोर गोष्टी
मला कळाव्या म्हणून हें तूं केलें. २० हे परमेश्वरा, जें
कांहीं आम्हीं आमच्या कानांनीं आजवर ऐकलें आहे त्या
सर्वांवरून पाहतां तुझ्यासमान कोणी नाहीं; तुझ्याशिवाय
अन्य देव नाहीं. २१ तुझ्या इस्राएल प्रजेसमान भूतलावर
दुसरें कोणतें तरी राष्ट्र आहे काय? आपली प्रजा
करून घेण्यासाठीं त्यांचा उद्धार करावयास देव स्वतः
गेला, यासाठीं कीं जी तुझी प्रजा तूं मिसर देशांतून
सोडविली तिच्या देखत मोठीं व भयानक कृत्यें
करून व इतर राष्ट्रांस घालवून देऊन तूं आपलें नांव
करावें. २२ तूं आपले लोक इस्राएल यांस तुझी
निरंतरची प्रजा केलें आहे; हे परमेश्वरा, तूं त्यांचा

देव झालास. २३ तर आतां हे परमेश्वरा, आपला
सेवक व त्याचें घराणें यांविषयीं जें वचन तूं दिलें तें
कायमचें सिद्धीस ने व आपल्या म्हणण्याप्रमाणें कर.
२४ सेनाधीश परमेश्वर इस्राएलाचा देव आहे, तो
इस्राएलाप्रीत्यर्थ देव आहे, आणि तुझा सेवक दावीद
याचें घराणें तुजसमोर स्थापीत आहे, असें म्हणून
लोकांनीं तुझ्या नामाची स्थापना करून त्याचा निरंतर
महिमा वाढवावा. २५ कारण, हे माझ्या देवा, तूं
आपल्या सेवकास कळविलें आहे कीं मी तुझें घराणें
स्थापीन, म्हणून तुला विनंति करावयाची हिम्मत तुझ्या
सेवकास आली. २६ आतां हे परमेश्वरा, तूंच देव
आहेस आणि तूं आपल्या सेवकाचें अशा प्रकारें बरें
करण्याविषयीं वचन दिलें आहे; २७ तर आतां प्रसन्न
होऊन आपल्या सेवकाच्या घराण्यास तूं अशी बरकत
दिली आहे कीं तें तुझ्या दृष्टीसमोर निरंतर कायम
राहावें, कारण हे परमेश्वरा, तूंच त्याचें अभीष्ट केलें
आहे व तें निरंतर धन्य झालें आहे.

१ यानंतर दाविदानें पलिष्ट्यांस मार देऊन
**१८** अंकित केलें आणि गथ व त्याच्या आसपासचे
गांव पलिष्ट्यांच्या हातून काढून घेतले. २ मग
त्यानें मवाब्यांस मार दिला आणि मवाबी दाविदाचे अंकित
होऊन त्यास करभार देऊं लागले. ३ सोबाचा राजा हद-
रेजर महानद फरात याजवळील आपली सत्ता स्थापीत
करावयास जात असतां दाविदानें त्याचा मोड केला.
४ दाविदानें त्याजपासून एक हजार रथ, सात हजार
स्वार व वीस हजार पायदळ हस्तगत केलें; रथांच्या सर्व
घोड्यांच्या शिरा दाविदानें तोडिल्या, मात्र त्यांतून शंभर
रथांचे घोडे राखून ठेविले. ५ दिमिष्क येथील अरामी लोक
सोबाचा राजा हदरेजर याला कुमक करावयास आले
तेव्हां दाविदानें त्यांतल्या बावीस हजार लोकांचा संहार
केला. ६ मग दाविदानें दिमिष्काच्या आसमंतांतील
अराम प्रांतांत ठाणीं बसविलीं; अरामी दाविदाचे अंकित
होऊन त्यास करभार देऊं लागले. जिकडेजिकडे दावीद
जाई तिकडेतिकडे परमेश्वर त्यास यश देई. ७ हदरे-
जर राजाच्या सेवकांजवळ सोन्याच्या ढाली होत्या त्या
दाविदानें घेऊन यरुशलेमास आणिल्या. ८ हदरेजर
याचीं टिभथ व कून हीं नगरें होतीं तेथून दाविदानें
पुष्कळ पितळ आणिलें; त्यापासूनच पुढें शलमोनानें
गंगाळसागर, खांब व पितळीं पात्रें केलीं. ९ दाविदानें
हदरेजराची सारी सेना मारिली हें हमाथाचा राजा
तोवू याच्या कानावर गेलें; १० दाविदानें हदरेजराशीं
युद्ध करून त्याचा मोड केला होता; म्हणून तोवू राजानें
दावीद राजाचें क्षेमकुशल विचारण्यास व त्याचें अभि-
नंदन करण्यास आपला पुत्र हदोराम याला त्याजकडे
पाठविलें; कारण हदरेजर व तोवू यांच्या लढाया होत
असत; हदोरामानें बरोबर हरतऱ्हेचीं सोन्यारुप्याचीं व
पितळेचीं पात्रें आणिलीं. ११ सर्व जिंकिलेल्या राष्ट्रांतून
आणिलेल्या सोन्याचांदीबरोबर हींहि पात्रें दावीद राजानें
परमेश्वराला समर्पिलीं; अदोमी, मवाबी, अम्मोनी,
पलिष्टी व अमालेकी या सर्वांपासून ही लूट आणिली
होती. १२ सरूवेचा पुत्र अबीशय यानें क्षार खोऱ्यांत
अठरा हजार अदोम्यांस मार दिला. १३ त्यानें
अदोमांत शिपायांचीं ठाणीं बसविलीं आणि सर्व
अदोमी लोक दाविदाचे अंकित झाले. दावीद जेथें गेला
तेथें परमेश्वरानें त्यास यश दिलें.

१४ दाविदानें सर्व इस्राएलावर राज्य केलें; तो
आपल्या सर्व प्रजेशीं न्यायानें व धर्मानें वर्ते.
१५ त्याचा मुख्य सेनापति सरूवेचा पुत्र यवाब हा
होता व त्याचा अखबारनवीस अहीलुदाचा पुत्र यहो-
शाफाट हा होता; १६ अहीटुबाचा पुत्र सादोक आणि
अब्याथाराचा पुत्र अबीमलेख हे याजक होते; शवूशा
हा चिटणवीस होता; १७ करेथी व पलेथी यांच्यावर
यहोयादाचा पुत्र बनाया हा होता; दाविदाचे पुत्रहि
राजाचे मंत्री होते.

१ पुढें अम्मोनी लोकांचा राजा नाहाश मृत्यु
**१९** पावला व त्याच्या गादीवर त्याचा पुत्र बसला.
२ तेव्हां दाविदानें मनांत आणिलें कीं हानुनाचा
बाप नाहाश यानें आपल्यावर दया केली तशीच आपण
त्याच्या पुत्रावर करावी, म्हणून दाविदानें त्याच्या बापाच्या

१ अथवा: घर बांधीन

मृत्यूबद्दल त्यांचें समाधान करावयास जासूद पाठविले.
हानूनाचें समाधान करण्यास दाविदाचे सेवक अम्मोनी
लोकांच्या देशीं आले, ३ त्या वेळीं अम्मोनी लोकांचे
सरदार हानूनास म्हणाले कीं दाविदानें तुझें समाधान
करण्यास लोक पाठविले आहेत ते तुझ्या बापाविषयींची
आदरबुद्धि दर्शविण्याकरितां पाठविले आहेत असें तुला
वाटतें काय ? या देशाची पाहणीटेहळणी करून त्याचा
विध्वंस करावा म्हणून त्याचे चाकर तुजकडे आले
आहेत, नाहीं काय ? ४ तेव्हां हानूनानें दाविदाच्या
चाकरांस पकडून त्यांचें मुंडन केलें व त्यांचीं वस्त्रें मधो-
मध कुल्यापर्यंत कापून टाकून त्यांस घालवून दिलें.
५ त्या लोकांची कशी काय संभावना झाली हें कोणीं
जाऊन दाविदास सांगितलें. हें वर्तमान ऐकून दाविदानें
त्यांची वाटेंत गांठ घेण्यास मनुष्य पाठविला; कारण
त्यांस मोठी लाज वाटत होती. राजानें त्यांस सांगून
पाठविलें कीं तुमची दाढी वाढेपर्यंत तुम्ही यरीहो येथें
राहा, मग इकडे या. ६ दाविदाला आपली किळस
आली आहे असें अम्मोनी लोकांनीं पाहिलें तेव्हां
हानून व अम्मोनी लोक यांनीं एक हजार किक्कार रुपें
पाठवून मेसोपटेम्या, अराम-माका व सोबा येथून रथ
व घोडेस्वार आणविले. ७ त्यांनीं बत्तीस हजार रथ,
माकाचा राजा व त्याचे लोक यांस मोल देऊन बोलाविलें;
त्यांनीं येऊन मेदबासमोर छावणी दिली. अम्मोनी
लोक आपआपल्या नगरांतून एकवट होऊन युद्धास
आले. ८ हें ऐकून दाविदानें यवाबास योद्ध्यांच्या सर्व
सैन्यासह पाठविलें. ९ तेव्हां अम्मोनी लोकांनीं बाहेर
पडून वेशीनजीक व्यूह रचिला; जे राजे आले होते ते
मैदानांत निराळे उभे होते. १० आपल्या मागें व पुढें
व्यूह रचिला आहे हें यवाबानें पाहून इस्राएल लढवय्यां-
तील निवडक शिपाई घेऊन त्यांस अराम्यांसमोर उभें
केलें; ११ आणि वरकड लोक त्यानें आपला भाऊ अबी-
शय याच्या हातीं दिले, व त्यांनीं अम्मोन्यांसमोर आपली
व्यूहरचना केली. १२ तो म्हणाला, अरामी मजहून
प्रबल होऊं लागले तर तूं मला साहाय्य कर आणि
अम्मोनी लोक तुजहून प्रबल झाले तर मी तुला साहाय्य
करीन. १३ हिंमत धर, आपण आपल्या लोकांसाठीं
आणि आपल्या देवाच्या नगरांसाठीं लढाईची शिकस्त
करूं, मग परमेश्वर आपल्या मर्जीस येईल तसें करो.
१४ पुढें यवाब व त्याच्याबरोबरचे लोक अराम्यांशीं
युद्ध करावयास चालून गेले तेव्हां ते त्याच्यापुढून पळून
गेले. १५ अरामी लोक पळून गेले हें पाहून अम्मोनी
लोकहि अबीशयाच्या पुढून पळून जाऊन नगरांत शिरले.
मग यवाब यरुशलेमास परत आला. १६ अरामी
लोकांनीं इस्राएलापुढें आपण पराजित झालों असें
पाहिलें तेव्हां त्यांनीं जासूद पाठवून महानदापलीकडील
अराम्यांस आणविलें; हदरेजराच्या सैन्याचा सेनापति
शोफख याच्या नायकत्वाखालीं ते आले. १७ हें
कोणीं दाविदास सांगितलें तेव्हां त्यानें अवघा इस्राएल
एकत्र जुळवून व यार्देनेपलीकडे जाऊन त्यांजवर चढाई
केली आणि सैन्यव्यूह रचिला; दाविदानें अराम्यांविरुद्ध
व्यूह रचिल्यावर ते त्यांजशीं लढूं लागले. १८ तेव्हां
अरामी इस्राएलापुढून पळून गेले; त्या वेळीं दाविदानें
त्यांच्या सात हजार रथांवरील माणसें व चाळीस हजार
पायदळ यांचा संहार केला आणि त्यांचा सेनापति
शोफख यास ठार केलें. १९ इस्राएलापुढें आपण
पराजित झालों हें पाहून हदरेजराचे जे अंकित होते ते
दाविदाशीं सल्ला करून त्याचे अंकित झाले; यानंतर
अराम्यांनीं अम्मोनी लोकांस साहाय्य केलें नाहीं.

२० १ राजे लोक युद्धाच्या मोहिमेस जातात त्या
समयीं म्हणजे वर्षारंभीं यवाबानें आपलें सैन्यबळ
घेऊन जाऊन अम्मोनी लोकांचा मुलूख उध्वस्त
केला आणि मग येऊन राब्बा नगरास वेढा घातला;
पण दावीद यरुशलेमांतच राहिला. यवाबानें राब्बा
नगरावर मारा करून तें उध्वस्त केलें. २ दाविदानें
त्या लोकांच्या राजाच्या मस्तकावरून मुकुट काढिला;
त्याचें वजन एक सोन्याचा किक्कार आहे असें त्यास कळून
आलें; तो रत्नजडित होता; तो दाविदाच्या मस्तकावर ठेव-
ण्यांत आला. त्यानें त्या नगरांतून पुष्कळ लूट आणिली.

१ निर्गम २५:३९ वरील टीप पाहा.

१ २ शमुवेल १२ : ३०-३१ वरील सगळ्या टिपा पाहा

३ त्यानें त्या नगराच्या रहिवाश्यांस बाहेर काढून
करवतींनीं, लोखंडी दांताळ्यांनीं व कुऱ्हाडींनीं कापिलें.
अम्मोन्यांच्या सर्व नगरांचेंहि त्यानें तसेंच केलें. मग
दावीद सर्व लोकांसह यरुशलेमास परत आला.
४ यानंतर पलिष्ट्यांशीं गेजेर येथें पुनः युद्ध झालें;
त्या प्रसंगीं हूशाथी सिब्बखय यानें रेफाई वंशांतला
सिप्पय यास जिवें मारिलें तेव्हां ते लोक शरण आले.
५ पलिष्ट्यांशीं पुनः युद्ध झालें तेव्हां याईराचा पुत्र
एलहानान यानें गथकर गल्याथ याचा भाऊ लहमी
याचा वध केला; गल्याथाच्या भाल्याची काठी साळ्याच्या
तुरीएवढी होती. ६ गथ येथें पुनः युद्ध झालें तेव्हां
तेथें रेफाई वंशांतला एक मोठा धिप्पाड पुरुष होता,
त्याच्या प्रत्येक हातास व पायास सहा सहा अशीं
एकंदर चोवीस बोटें होतीं. ७ त्यानें इस्राएलाची
अवहेलना केल्यावरून दाविदाचा भाऊ शिमी याचा
पुत्र योनाथान यानें त्याचा वध केला. ८ हे पुरुष
गथ गांवीं रेफाईला झाले होते; ते दाविदाच्या व त्याच्या
सेवकांच्या हातानें पडले.

२१ १ नंतर सैतानानें इस्राएलाविरुद्ध उठून
इस्राएलाची गणती करावयास दाविदाला प्रवृत्त
केलें. २ दाविदानें यवाबास व लोकांच्या
सरदारांस सांगितलें, जा, बैर-शेबापासून दानापर्यंत
इस्राएलांची मोजदाद करून मला कळवा म्हणजे त्यांची
संख्या किती आहे हें मला समजेल. ३ यवाब म्हणाला,
लोक कितीहि असोत, परमेश्वर त्यांस शतगुणित करो;
पण माझे स्वामीराज, हे सर्व स्वामींचे दास
आहेत ना? माझे स्वामी असें करावयास कां सांगतात?
इस्राएलावर दोष आणण्यास त्यांनीं कारण कां व्हावें?
४ तथापि राजाज्ञेपुढें यवाबाचें कांहीं चाललें नाहीं,
म्हणून यवाब निघून सर्व इस्राएल देशभर फिरून
यरुशलेमास आला. ५ तेव्हां यवाबानें प्रजेच्या मोज-
दादीची यादी दाविदास दिली. सर्व धारकरी पुरुष
इस्राएलांत अकरा लक्ष आणि यहूदांत चार लक्ष सत्तर
हजार भरले. ६ त्यांच्यांत लेवी व बन्यामिनी
यांची टीप घेतली नाहीं; कारण या राजाज्ञेचा
यवाबास वीट आला होता. ७ या गोष्टीवरून देवाची
इतराजी होऊन त्यानें इस्राएलावर मारा केला. ८ दावीद
देवास म्हणाला, हें मीं केलें त्यांत मीं मोठें पाप केलें
आहे, तर आतां आपल्या सेवकास दोषमुक्त कर;
कारण मीं मोठा मूर्खपणा केला आहे. ९ परमेश्वरानें
दाविदाचा द्रष्टा गाद यास म्हटलें, १० जा, दाविदास
सांग, परमेश्वर म्हणतो, मी तुझ्यापुढें तीन गोष्टी
ठेवितों, त्यांपैकीं कोणती करावी ती निवड.
११ तेव्हां गादानें दाविदाकडे जाऊन त्यास सांगितलें,
परमेश्वर म्हणतो, पुढील गोष्टींपैकीं तुला वाटेल ती
एक निवड; १२ तीन वर्षे दुष्काळ पडावा, अथवा
तीन महिने तुझ्या शत्रूंचीं तरवार तुजवर चालून तुझा
नाश व्हावा, किंवा तीन दिवस परमेश्वराची तरवार
म्हणजे मरी देशांत पसरून परमेश्वराच्या दूतानें सर्व इस्रा-
एली मुलखाचा नाश करावा. ज्यानें मला पाठविलें आहे
त्याला मीं काय उत्तर द्यावें तें चांगला विचार करून
सांग. १३ दावीद गादास म्हणाला, मी मोठ्या पेचांत
पडलों आहें; आतां परमेश्वराच्या हातीं मला पडूं
द्या, कारण त्याचें वात्सल्य मोठें आहे; मनुष्याच्या
हातीं मीं पडूं नये. १४ मग परमेश्वरानें इस्राएलांत
मरी पाठविली आणि त्यांच्यांतले सत्तर हजार लोक
पडले. १५ देवानें यरुशलेमाचा नाश करण्यास एक
देवदूत पाठविला; तो त्याचा नाश करणार हें परमे-
श्वरानें पाहिलें तेव्हां या अरिष्टाविषयीं परमेश्वराला
वाईट वाटलें व त्या नाश करणाऱ्या देवदूतास तो
म्हणाला, आतां पुरें कर, आपला हात आटोप. त्या
समयीं परमेश्वराचा दूत अर्णान यबुसी याच्या खळ्या-
नजीक होता. १६ दाविदानें वर दृष्टि केली तों
परमेश्वराचा दूत आपल्या हातीं उपसलेली तरवार घेऊन
यरुशलेमावर उगारून आकाश व पृथ्वी यांच्यामध्यें
उभा आहे असें त्याला दिसलें, तेव्हां दावीद व वडील
जन यांनीं दंडवत घातलें; त्या वेळीं त्यांनीं गोणताट
धारण केलें होतें. १७ दावीद देवास म्हणाला, लोकांची
मोजदाद करावयाची आज्ञा करणारा मीच ना?

१ २ शमुवेल २४:१६ इत्यादि स्थळीं अरवना.

मींच हें पाप केलें आहे, मींच हें दुराचरण केलें आहे;
या मेंढरांनीं काय केलें आहे? हे परमेश्वरा, माझ्या
देवा, तुझा हात माझ्यावर व माझ्या पितृकुळावर
पडावा, तुझ्या लोकांवर तो पडून त्यांचा नाश होऊं
नये. १८ तेव्हां परमेश्वराच्या दूतानें गादास आज्ञा
केली, तूं दाविदास सांग कीं तूं वरतीं जाऊन अर्णान
यबूसी याच्या खळ्यांत परमेश्वराप्रीत्यर्थ एक वेदी
बांध. १९ गादानें परमेश्वराच्या नामानें सांगितलें
त्याप्रमाणें दावीद वरतीं गेला. २० अर्णान मागें वळून
पाहतो तों देवदूत त्याच्या दृष्टीस पडला, तेव्हां
त्याच्याबरोबर असलेले त्याचे चार पुत्र लपून
राहिले. या वेळीं अर्णान गहूं मळीत होता,
२१ दावीद आपल्याकडे येत आहे हें पाहून अर्णान
खळ्याबाहेर गेला व त्यानें भूमीपर्यंत लवून दाविदास
प्रणाम केला. २२ दावीद अर्णानास म्हणाला, या
खळ्याची जागा मला दे; लोकांवरली ही मरी दूर
व्हावी म्हणून येथें परमेश्वराप्रीत्यर्थ मला एक वेदी
बांधावयाची आहे; पुरें मोल घेऊन ही मला दे.
२३ अर्णान दाविदास म्हणाला, ही जमीन आपणाला घ्या,
माझ्या स्वामीराजांनीं जें कांहीं ठीक दिसेल तें करावें.
पाहा, होमबलीसाठीं बैल, इंधनासाठीं मळणीचीं
आऊतें व अन्नार्पणासाठीं गहूं हीं सर्व मी आपणाला देतों.
२४ दावीद राजा अर्णानास म्हणाला, नाहीं, नाहीं, मी
पुरें मोल देऊन या वस्तु घेईन; कारण जें तुझ्या
मालकीचें आहे तें मी परमेश्वराकरितां घेणार नाहीं;
फुकट मिळालेला होमबलि मी अर्पिणार नाहीं. २५ तेव्हां
दाविदानें त्या जागेबद्दल सहाशें शेकेल सोनें तोलून
दिलें. २६ दाविदानें तेथें परमेश्वराप्रीत्यर्थ वेदी बांधून
होमबलि व शांत्यर्पणें अर्पिलीं आणि परमेश्वराचा धावा
केला; परमेश्वरानें त्या होमबलीच्या वेदीवर दिव्याग्नि
पाडून त्यास उत्तर दिलें. २७ परमेश्वरानें देवदूतास
आज्ञा केली, आणि त्यानें आपली तरवार म्यानांत
परत घातली.

२८ त्या प्रसंगीं परमेश्वरानें अर्णान यबूसी याच्या
खळ्यांत आपली विनंति ऐकली हें पाहून दाविदानें
यज्ञ केला. २९ मोशानें रानांत केलेला परमेश्वराचा
निवासमंडप आणि होमार्पणाची वेदी हीं दोन्ही त्या
काळीं गिबोन येथल्या उच्च स्थानीं होतीं; ३० पण दावीद
देवास प्रश्न विचारावयास त्याच्यापुढें जाण्यास धजेना;
परमेश्वराच्या दूताच्या तरवारीचा त्याला धाक पडला
होता. १ त्या समयीं दावीद म्हणाला, परमेश्वर
२२ देवाचें मंदिर हेंच आणि इस्राएलाचे होमबलि
अर्पिण्याची वेदी हीच.

२ इस्राएल देशांत जे परदेशीय राहत होते त्यांस
एकत्र करण्याची दाविदानें आज्ञा केली आणि देवाचें
मंदिर बांधण्यासाठीं चिरे घडून तयार करण्यास पाथर-
वट लाविले; ३ आणि दाविदानें दाराच्या कवाडांसाठीं
खिळे आणि सांध्यांसाठीं पुष्कळ लोखंड, अपरिमित
पितळ, ४ व असंख्य गंधसरू हीं जमा केलीं. सीदोन
व सोर एथल्या लोकांनीं गंधसरूचीं पुष्कळ लाकडें
दाविदास आणून दिलीं. ५ दावीद म्हणाला, माझा पुत्र
शलमोन तरुण व सुकुमार आहे, आणि जें मंदिर परमे-
श्वराप्रीत्यर्थ बांधावयाचें आहे तें अत्यंत भव्य, सर्व
देशांत विख्यात व शोभिवंत झालें पाहिजे म्हणून मला
त्यासाठीं तयारी केली पाहिजे. या प्रकारें दाविदानें
आपल्या मरणापूर्वीं पुष्कळ तयारी केली.

६ मग त्यानें आपला पुत्र शलमोन यास बोलावून
इस्राएलाचा देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ मंदिर बांधण्याची
आज्ञा केली. ७ दावीद आपला पुत्र शलमोन यास
म्हणाला, माझा देव परमेश्वर याच्या नामाप्रीत्यर्थ मंदिर
बांधावें असा माझा मानस होता खरा, ८ पण परमे-
श्वराचा आदेश मला प्राप्त झाला कीं तूं बहुत रक्तपात
केला आहे आणि पुष्कळ युद्धें केलीं आहेत; तुला माझ्या
नामानें मंदिर बांधावयाचें नाहीं, कारण तूं माझ्यादेखत
पृथ्वीवर पुष्कळ रक्तपात केला आहे. ९ पाहा, तुला
एक पुत्र होईल तो शांतताप्रिय मनुष्य असेल. मी त्यास
त्याच्या चोहोंकडल्या शत्रूंपासून विसांवा देईन; त्याचें नांव
शलमोन (शांतताप्रिय) असें होईल; त्याच्या कारकीर्दीत
मी इस्राएलास शांति व स्वस्थता देईन. १० तो माझ्या
नामाप्रीत्यर्थ मंदिर बांधील; तो माझा पुत्र व मी त्याचा

पिता होईन; इस्राएलावरील त्याची गादी मी निरंतरची
स्थापीन. ११ तर आतां माझ्या पुत्रा, परमेश्वर तुझ्या-
बरोबर असो; तूं कृतार्थ हो, आणि परमेश्वर तुझा देव
तुझ्यासंबंधानें म्हणाला आहे त्याप्रमाणें त्याचें मंदिर बांध.
१२ तुझा देव परमेश्वर याचें नियमशास्त्र तूं पाळावें
म्हणून परमेश्वर तुला चातुर्य व विवेकबुद्धि हीं देवो व
इस्राएलावर तुझा अधिकार स्थापीत करो. १३ परमे-
श्वरानें मोशाला इस्राएलासंबंधानें सांगितलेले नियम व
निर्णय जर तूं पाळिशील तर तूं कृतार्थ होशील; दृढ हो,
हिंमत धर, भिऊं नको, कचरूं नको. १४ मी संकटांत
असतांहि परमेश्वराच्या मंदिराप्रीत्यर्थ एक लक्ष किक्कार
सोनें व दहा लक्ष किक्कार चांदी सिद्ध केली आहे;
पितळ व लोखंड हीं तर अतिशयित आहेत, तीं अपरिमित
आहेत; लाकूड व चिरे हीं मीं तयार केलीं आहेत,
तुलाहि त्यांत भर घालितां येईल. १५ शिवाय तुजजवळ
कामगार बहुत आहेत; पाथरवट व इमारती
लाकडाचें काम करणारे आणि इतर सर्व प्रकारच्या
कामांत निपुण असे लोक आहेत; १६ सोनें, रुपें,
पितळ व लोखंड हीं अपरिमित आहेत; तर आतां उठून
कामाला लाग, परमेश्वर तुझ्याबरोबर असो. १७ दाविदानें
इस्राएलाच्या सर्व सरदारांस आज्ञा केली कीं माझा
पुत्र शलमोन याला साहाय्य करा. १८ तो म्हणाला,
तुमचा देव परमेश्वर तुमच्याबरोबर आहे, नाहीं काय?
त्यानें तुम्हांस चोहोंकडे शांतता दिली आहे ना? त्यानें
देशदेशचे लोक माझ्या हातीं दिले आहेत आणि देश
परमेश्वराच्या व त्याच्या लोकांच्या ताब्यांत आला आहे.
१९ तर आतां तुम्ही आपला देव परमेश्वर यास जिवें-
भावें शरण जा. उठा, परमेश्वर देवाचें पवित्रस्थान
बांधावयास लागा; परमेश्वराच्या नामाप्रीत्यर्थ जें मंदिर
बांधावयाचें आहे त्यांत परमेश्वराच्या कराराचा कोश
व देवाचीं पवित्र पात्रें ठेवावयाचीं आहेत.

२३
१ दावीद आतां वृद्ध व वयातीत झाला
होता, म्हणून त्यानें आपला पुत्र शलमोन
यास इस्राएलावर राजा नेमिलें. २ त्यानें
इस्राएलाचे सर्व सरदार, याजक व लेवी यांस एकवट
केलें. ३ तीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे जितके
लेवी होते त्यांची गणती केली; त्यांची शिरगणती
केली तीं अडतीस हजार भरली. ४ त्यांतले चोवीस
हजार परमेश्वराच्या मंदिराच्या कामाची देखरेख
करण्यास नेमिले; सहा हजार अमलदार व न्यायाधीश
होते; ५ चार हजार द्वारपाळ होते; आणि परमेश्वराचीं
स्तोत्रें म्हणणाऱ्यांसाठीं दाविदानें जीं वाद्यें केलीं होतीं
त्यांवर परमेश्वराचें स्तवन करण्यासाठीं चार हजार
मनुष्यें नेमिलीं. ६ लेवीचे पुत्र गेर्षोन कहाथ व
मरारी यांच्या कुळांप्रमाणें दाविदानें त्यांचे वर्ग केले होते.
७ गेर्षोनांतला लादान व शिमी; ८ लादानाचे पुत्र
यहीएल मुख्य व जेथाम व योएल असे तीन;
९ शिमीचे पुत्र शलोमोथ, हजिएल व हारान असे तीन;
हे लादानाच्या पितृकुळांचे मुख्य होते; १० आणि
शिमीचे पुत्र यहथ, जीजा, यऊश व बरीया हे चौघे
शिमीचे पुत्र; ११ यहथ हा प्रमुख व जीजा हा दुसरा;
यऊश व बरीया यांची पुत्रसंतति बहुत नव्हती,
म्हणून त्यांचें एकच पितृकुळ ठरविलें. १२ कहाथाचे
पुत्र अम्राम, इसहार, हेब्रोन, उज्जियेल असे चार;
१३ अम्रामाचे पुत्र अहरोन व मोशे; अहरोनास
वेगळें करण्यांत आलें तें अशासाठीं कीं त्यानें व
त्याच्या वंशजांनीं निरंतर परमपवित्र वस्तु पवित्र
राखाव्या, निरंतर परमेश्वरासमोर धूप जाळावा, त्याची
सेवाचाकरी करावी व त्याच्या नामानें आशीर्वाद द्यावा.
१४ देवाचा माणूस मोशे याचे पुत्र लेवी वंशांत
मोडत. १५ मोशाचे पुत्र गेर्षोम व अलियेजर.
१६ गेर्षोमाच्या पुत्रांमध्यें शबुएल मुख्य, १७ आणि
अलियेजराच्या पुत्रांमध्यें रहब्या मुख्य; अलियेजराला
दुसरे पुत्र झाले नाहींत, परंतु रहब्याचे पुत्र बहुत
होते. १८ इसहाराच्या पुत्रांमध्यें शलोमीथ मुख्य;
१९ हेब्रोनाच्या पुत्रांमध्यें यरीया मुख्य, व अमऱ्या दुसरा,
यहजिएल तिसरा व यकमाम् चौथा; २० उज्जियेलाच्या
पुत्रांमध्यें मीखा मुख्य व इश्शिया दुसरा; २१ मरारीचे
पुत्र महली व मूशी; महलीचे पुत्र एलाजार व कीश
२२ एलाजार निपुत्रिक मेला, त्याला केवळ कन्या

होत्या; त्यांचे भाऊबंद कीशपुत्र यांनीं त्यांजशीं विवाह
केला. २३ मूशीचे पुत्र: महली, एदर व यरेमोथ असे
तीन. २४ लेव्याच्या पितृकुळांतील मुख्य पुरुष हेच;
त्यांचीं नांवें घेऊन शिरगणती केली; ते वीस वर्षांचे व
त्याहून अधिक वयाचे असून परमेश्वराच्या मंदिरांत
सेवा करीत असत. २५ दावीद म्हणाला, इस्राएलाचा
देव परमेश्वर यानें आपल्या प्रजेस विसावा दिला आहे,
व यरुशलेमांत त्याचा निरंतरचा निवास आहे;
२६ निवासमंडप व त्यामधील सेवेचीं उपकरणें हीं
लेव्यांस पुन: वाहून न्यावयाची जरूर पडणार नाहीं.
२७ दाविदाच्या शेवटल्या आज्ञेवरून वीस वर्षांच्या व
त्याहून अधिक वयाच्या लेव्यांची गणती झाली. २८ अह-
रोन वंशजांच्या हाताखालीं परमेश्वराच्या मंदिराचीं
अंगणें व कोठड्या यांत सेवा करणें व सर्व पवित्र वस्तु
शुद्ध राखणें हें देवाच्या मंदिरांतील सेवेसंबंधाचें सर्व
काम त्यांच्याकडे होतें. २९ समर्पित भाकर, अन्नबली-
साठीं सपीठ, बेखमीर पापड, तव्यावर भाजलेलें अथवा
मळलेलें सर्व कांहीं सिद्ध करण्याचें व सर्व प्रकारचें तोल-
माप करण्याचें काम त्यांजकडे होतें. ३० सकाळसंध्या-
काळ नित्य परमेश्वराचें उपकारस्मरण व स्तवन करण्यास
त्यांना उभें राहावें लागत असे. ३१ तसेंच शब्बाथाच्या
व चंद्रदर्शनाच्या दिवशीं व नेमिलेल्या पर्वणीस ठरींव
संख्येप्रमाणें नेहमीं परमेश्वरासमोर उभें राहून सर्व
होमबलि त्यांना त्यास अर्पावे लागत. ३२ परमेश्वराच्या
मंदिराच्या सेवेप्रीत्यर्थ दर्शनमंडपाचें व पवित्रस्थानाचें
रक्षण करणें आणि त्यांचे भाऊबंद अहरोन वंशज यांस
नेमून दिलेल्या कामीं मदत करणें हें त्यांचें काम होतें.

२४ १ अहरोनवंशजांचे वर्ग हे: अहरोनाचे पुत्र
नादाब, अबीहू, एलाजार व इथामार.
२ नादाब व अबीहू हे आपल्या बापापूर्वी
निपुत्रिक मेले म्हणून एलाजार व इथामार हे याजकाचें
काम करीत. ३ दाविदानें एलाजाराच्या वंशांतला
सादोक व इथामाराच्या वंशांतला अहीमलेख यांस
त्यांचीं सेवेचीं कामें वांटून दिलीं. ४ इथामाराच्या
वंशजांपेक्षां एलाजाराच्या वंशजांत प्रमुख पुरुष
अधिक निपजले, त्यांची वांटणी येणेंप्रमाणें झाली:
एलाजाराच्या वंशांतील पितृकुळांचे प्रमुख सोळा
होते, आणि इथामाराच्या वंशांतले पितृकुळां-
प्रमाणें आठ होते. ५ याप्रमाणें दोन्ही घराण्यांतले पुरुष
घेऊन त्यांची चिठ्या टाकून वांटणी केली; कां कीं
पवित्रस्थानाचा अधिकार व देवाकडची सरदारी
एलाजार व इथामार या दोन्ही वंशांतल्या पुरुषांकडे
होती. ६ आणि लेव्यांपैकीं नथनेल लेखक याचा पुत्र
शमाया यानें राजा व अधिकारी, सादोक याजक व अब्या-
थाराचा पुत्र अहीमलेख आणि लेवी व याजक यांच्या
पितृकुळांचे प्रमुख यांच्यासमोर त्यांचीं नांवें लिहिलीं;
एक प्रमुख घराणें एलाजाराचें व एक इथामाराचें अशीं
धरिलीं. ७ पहिली चिठी यहोयारीबाची निघाली, दुसरी
यदायाची, ८ तिसरी हारीमाची. चवथी सोरीमाची,
९ पांचवी मल्कीयाची, सहावी मीयामिनाची, १० सा-
तवी हक्कोसाची, आठवी अबीयाची, ११ नववी
येशूवाची, दहावी शकन्याची, १२ अकरावी एल्या-
शिबाची, बारावी याकीमाची, १३ तेरावी हुप्पाची,
चवदावी येशेबाबाची, १४ पंधरावी बिल्गाची, सोळावी
इम्मेराची, १५ सतरावी हेजीराची, अठरावी हप्पिसे-
साची, १६ एकुणिसावी पथह्याची, विसावी यहेज-
केलाची, १७ एकविसावी याखीनाची, बाविसावी
गामूलाची, १८ तेविसावी दलायाची आणि चोविसावी
माज्याची. १९ इस्राएलाचा देव परमेश्वर यानें आज्ञा
केली होती तदनुसार त्यांचा पूर्वज अहरोन याच्या
हस्तें त्यांस लावून दिलेल्या विधीप्रमाणें परमेश्वराच्या
मंदिरांत सेवा करावयास पाळीपाळीनें जावयाचा
त्यांना हा क्रम लावून दिला होता.

२० लेवीचे वरकड वंशज: अम्रामाच्या वंशांतला
शूबाएल, शूबाएलाच्या पुत्रांतला येहदाया. २१ रहब्याचे
वंशज रहब्याच्या वंशांत मुख्य इश्शिया. २२ इसहा-
रीयांतला शलोमोथ, शलोमोथाच्या पुत्रांतला यहथ;
२३ हेब्रोनाचे पुत्र: यरीया, दुसरा अमऱ्या, तिसरा
यहजियेल, चवथा यकमाम. २४ उज्जियेलाच्या वंशांतला
मीखा, मीखाच्या पुत्रांतला शामीर. २५ मीखाचा भाऊ

इश्शिया, इश्शियाच्या वंशांतला जखऱ्या; २६ मरारीचे पुत्र: महली व मूशी; याजीयाचा वंशज बनो. २७ मरारीच्या वंशांतले याजीयाचे पुत्र: बनो, शोहम, जक्कूर व इब्री. २८ महलीचा एलाजार, याला पुत्र झाला नाहीं. २९ किशाचे वंशज: किशाचा वंशज यरहमेल. ३० मूशीचे पुत्र: महली, एदर व यरीमोथ; हे लेव्यांचे वंशज आपआपल्या पितृकुळांप्रमाणें होते. ३१ यांनीहि आपले बांधव अहरोनवंशज यांच्याप्रमाणें दावीद राजा, सादोक, अहीमलेख आणि याजकांच्या व लेव्यांच्या पितृकुळांचे प्रमुख पुरुष यांच्यासमोर चिठ्या टाकिल्या; मुख्य पुरुषाचें पितृकुळ त्याच्या कनिष्ठ बांधवाच्या पितृकुळांबरोबर गणिलें.

२५ १ दावीद व सेनापति यांनीं आसाफ, हेमान व यदूथून यांच्या वंशजांपैकीं कित्येकांस वीणा, सारंगी व झांजा वाजवून संदेश देण्याची सेवा करावी म्हणून वेगळें केलें: सेवेचें हें काम करणाऱ्यांची संख्या येणेंप्रमाणें: २ आसाफाच्या वंशांतले जक्कूर, योसेफ नथन्या व अशेराला हे आसाफाचे पुत्र; राजाज्ञेप्रमाणें आसाफाच्या हाताखालीं हे संदेश देत असत. ३ यदूथूनाचे वंशज यदूथूनाचे पुत्र गदल्या, सरी, यशाया, हशब्या व मत्तिथ्या असे सहा; त्यांचा बाप यदूथून वीणा वाजवून परमेश्वराचें उपकारस्मरण व स्तवन करून संदेश देत असे, ते त्याच्या हाताखालीं असत. ४ हेमानाचे वंशज: हेमानाचे पुत्र बुक्कीया, मत्तन्या, उज्जियेल, शबुएल, यरीमोथ, हनन्या, हनानी, अलियाथा, गिद्दल्ती, रोममती-एजेर, याश्बकाशा, मल्लोथी, होथीर व महजियोथ; ५ राजाचा द्रष्टा हेमान, जो रणशिंग वाजवून परमेश्वराचें वचन सांगत असे, त्याचे हे पुत्र; देवानें हेमानाला चवदा पुत्र व तीन कन्या दिल्या. ६ हे सर्व परमेश्वराच्या मंदिरांत आपआपल्या बापाच्या हाताखालीं राहून देवाच्या मंदिराच्या सेवेंत झांजा, सारंगी व वीणा वाजवून गात असत; आसाफ, यदूथून व हेमान हे राजाच्या आज्ञेत असत. ७ ते व त्यांचे भाऊबंद परमेश्वराप्रीत्यर्थ गाण्याचें शिक्षण मिळून तरबेज झालेले असे दोनशें अठ्याऐशीं होते. ८ त्या सर्वांनीं म्हणजे लहानमोठ्यांनीं आणि गुरुशिष्यांनीं चिठ्या टाकून आपआपलीं कामें वांटून घेतलीं. ९ तेव्हां पहिली चिठी आसाफ मंडळीपैकीं योसेफ याची निघाली; दुसरी गदल्याची; तो, त्याचे भाऊबंद व पुत्र मिळून बारा; १० तिसरी जक्कूराची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; ११ चवथी इस्रीची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; १२ पांचवी नथन्याची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; १३ सहावी बुक्कीयाची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; १४ सातवी यशरेलाची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; १५ आठवी यशयाची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; १६ नववी मत्तन्याची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; १७ दहावी शिमीची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; १८ अकरावी अजरेलाची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; १९ बारावी हशब्याची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; २० तेरावी शूबाएलाची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; २१ चवदावी मत्तिथ्याची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; २२ पंधरावी यरेमोथाची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; २३ सोळावी हनन्याची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; २४ सतरावी याश्बकाशाची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; २५ अठरावी हनानीची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; २६ एकुणिसावी मल्लोथीची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; २७ विसावी अलीयाथाची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; २८ एकविसावी होथीराची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; २९ बाविसावी गिद्दल्तीची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; ३० तेविसावी महजियोथाची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा; ३१ आणि चोविसावी रोममती-एजेराची, त्याचे पुत्र व भाऊबंद मिळून बारा.

२६ १ द्वारपाळांचे वर्ग: कोरहाचे वंशज आसाफाच्या वंशांतला कोरहाचा पुत्र मशेलेम्या; २ मशेलेम्याचे पुत्र: जखऱ्या ज्येष्ठ,

१ शिमी हा धरून सहा; पुढें सतरावें वचन पाहा.

यदिएल दुसरा, जबद्या तिसरा, यथनिएल चौथा. ३ एलाम पांचवा, यहोहानान सहावा व एल्योवेनय सातवा; ४ ओबेद-अदोमाचे पुत्र: शमाया ज्येष्ठ, यहोजाबाद दुसरा, यवाह तिसरा, साखार चवथा, नथनेल पांचवा, ५ अम्मीएल सहावा, इस्साखार सातवा, पउलथय आठवा; देवानें त्याला बरकत दिली होती. ६ त्याचा पुत्र शमाया याला पुत्र झाले; ते महावीर असल्यामुळें त्यांची त्यांच्या पितृकुळांवर सत्ता होती. ७ शमायाचे पुत्र: अथनी, रफाएल, ओबेद, एलजाबाद; आणि त्यांचे बंधु अलीहू व समख्या हे बलवान् होते. ८ हे सर्व ओबेद-अदोमाच्या वंशांतले; हे यांचे पुत्र व भाऊबंद सेवेच्या कामांत बलवान् व जोमदार होते; असे ओबेद-अदोमाचे बासष्ट वंशज होते. ९ आणि मशेलेम्याचे पुत्र व भाऊबंद मिळून अठरा बलवान् पुरुष होते. १० मरारीच्या वंशांतला होसा याचे पुत्र; शिम्री मुख्य; हा ज्येष्ठ नसतांहि त्याच्या बापानें त्याला मुख्य केलें होतें; ११ हिल्कीया दुसरा, टबल्या तिसरा, जखऱ्या चौथा, असे होसा याचे पुत्र व भाऊबंद मिळून तेरा होते. १२ द्वारपाळांचे वर्ग या मुख्य पुरुषांतले होते; आपल्या भाऊबंदांबरोबर तेहि परमेश्वराच्या मंदिरांत सेवा करीत. १३ त्यांतल्या लहानथोरांनीं आपआपल्या पितृकुळांप्रमाणें एकेका द्वारासंबंधानें चिठी टाकिली. १४ पूर्वद्वाराची चिठी शलेम्याच्या नांवाची निघाली. त्यांनीं त्याचा पुत्र जखऱ्या जो सुज्ञ मंत्री होता त्याच्या नांवाची चिठी टाकिली ती उत्तरद्वाराची निघाली. १५ दक्षिणद्वाराची चिठी ओबेद-अदोम याच्या नांवाची निघाली, त्याच्या मुलांच्या नांवांवर भांडारगृहाची चिठी निघाली. १६ शुप्पीम व होसा यांच्या नांवांची चिठी पश्चिमद्वाराची निघाली; शल्लेकेथ नांवाच्या द्वारापाशीं चढून जाण्याच्या सडकेवर समोरासमोर त्यांनीं पहारा करावा असें ठरलें. १७ पूर्वेच्या बाजूस सहा लेवी, उत्तरेस रोजचे चार व दक्षिणेस रोजचे चार व भांडारगृहावर दोन दोन असे नेमिले. १८ पश्चिमेस परबार (मंदिराचें शिवार) याच्यासाठीं सडकेजवळ चार व खुद्द परबार येथें दोन. १९ हे द्वारपाळांचे वर्ग होत; त्यांतले कांहीं कोरह वंशांतले व कांहीं मरारी वंशांतले होते.

२० लेव्यांपैकीं अहीया हा देवमंदिराच्या भांडारांवर व देवास वाहिलेल्या वस्तूंच्या भांडारांवर होता. २१ लादानाचे वंशज: लादान गेर्षोनी यांच्या पितृकुळांतला प्रमुख पुरुष यहीएली. २२ यहीएलीचे पुत्र जेथाम व त्याचा भाऊ योएल; हे परमेश्वराच्या मंदिराच्या भांडारगृहांवर होते. २३ अम्रामी, इसहारी, हेब्रोनी, उज्जियेली यांपैकीं कांहीं होते. २४ शबुएल बिन गेर्षोम बिन मोशे भांडारांवर नायक होता. २५ याचे भाऊबंद हे: अलियेजाराचा पुत्र रहब्या, त्याचा पुत्र यशया, त्याचा पुत्र योराम, त्याचा पुत्र जिख्री व त्याचा पुत्र शलोमोथ. २६ दावीद राजा, पितृकुळांचे मुख्य पुरुष, सहस्रपति, शतपति व मुख्य सेनापति यांनीं देवास वाहिलेल्या वस्तूंच्या भांडारांवर शलोमोथ व त्याचे भाऊबंद यांस नेमिलें होतें. २७ लढाईंत जी लूट त्यांस मिळत असे तीपैकीं कांहीं परमेश्वराचें मंदिर दुरुस्त करण्यासाठीं ते समर्पण करीत. २८ शमुवेल द्रष्टा, किशाचा पुत्र शौल, नेराचा पुत्र अबनेर, आणि सरूवेचा पुत्र यवाब यांनीं ज्या वस्तु समर्पिल्या होत्या त्या व इतरांनीं ज्या समर्पिल्या होत्या त्या सर्व शलोमोथ व त्याचे बांधव यांच्या हवालीं केल्या होत्या. २९ इसहाऱ्यांपैकीं कनन्या व त्याचे वंशज यांस इस्राएलाच्या सरदारीचें व न्यायाचें बाहेरलें काम चालविण्यासाठीं नेमिलें होतें. ३० हेब्रोन्यांपैकीं हशब्या व त्याचे भाऊबंद एक हजार सातशें वीर असून ते यार्देनेच्या पश्चिमेस परमेश्वराच्या सर्व सेवेसंबंधानें व राजाच्या कामगिरीसंबंधानें इस्राएलावर देखरेख करणारे होते. ३१ हेब्रोन्यांतला यरीया हा त्यांच्या पितृकुळांप्रमाणें त्यांचा मुख्य होता. दाविदाच्या कारकीर्दीच्या चाळिसाव्या वर्षी त्यांचा शोध केला तेव्हां त्यांतले कांहीं शूर वीर गिलादांतल्या याजेरांत सांपडले. ३२ त्याचे बांधव वीर असून आपआपल्या पितृकुळांचे मुख्य होते; ते दोन हजार सातशें होते. त्यांस दावीद राजानें

देवाच्या कार्यासंबंधानें व राजाच्या सर्व कारभारासंबंधानें
रऊबेनी, गादी, व मनश्शाचा अर्धा वंश यांजवर
देखरेख करण्याच्या कामावर नेमिलें होतें.

१ इस्राएलांची गणती म्हणजे पितृकुळां-
२७ तील मुख्य पुरुष, सहस्रपति, शतपति व त्यांचे
सरदार यांची आणि जे वर्षभर प्रतिमासीं कामा-
वर हजर होते, सुटी मिळाली म्हणजे जात व
अशा प्रकारें राजाची सेवाचाकरी करीत, त्यांची
प्रत्येक वर्गाप्रमाणें गणती चोवीस हजार होती.
२ पहिल्या महिन्याच्या पहिल्या वर्गावर जब्दीएलाचा
पुत्र याशबाम होता; त्याच्या वर्गांत चोवीस हजार होते.
३ तो पेरेसाच्या वंशांतला होता व पहिल्या महिन्यांत
सैन्याच्या सर्व सरदारांचा मुख्य असे. ४ दुसऱ्या
महिन्याच्या वर्गावर दोदय अहोही हा आणि त्याचा वर्ग
असे; मिक्लोथ हा त्यांचा नायक होता; त्याच्या वर्गांत
चोवीस हजार होते. ५ तिसऱ्या महिन्याचा तिसरा
सेनापति यहोयादा याचा पुत्र बनाया, हा मुख्य याजक
होता; त्याच्या वर्गांत चोवीस हजार होते, तिसां-
मध्यें शूर व तिसांमध्यें वरिष्ठ असा जो तोच हा बनाया;
त्याचा पुत्र अम्मीजाबाद हाहि त्याच्याच वर्गांत होता.
७ चवथ्या महिन्याचा चवथा सरदार यवाबाचा भाऊ
असाएल हा होता; त्याच्यामागून त्याचा पुत्र जबद्या
हा होता; त्याच्या वर्गांत चोवीस हजार होते.
८ पांचव्या महिन्याचा पांचवा सरदार शम्हूथ इस्राही
हा होता; त्याच्या वर्गांत चोवीस हजार होते.
९ सहाव्या महिन्याचा सहावा सरदार इक्केशाचा पुत्र
इरा तकोई हा होता; त्याच्या वर्गांत चोवीस हजार
होते. १० सातव्या महिन्याचा सातवा सरदार एफ्रा-
इमाच्या वंशांतला हेलेस पलोनी हा होता; त्याच्या
वर्गांत चोवीस हजार होते. ११ आठव्या महिन्याचा
आठवा सरदार जेरहवंशांतला सिब्बखय हुशाथी हा
होता; त्याच्या वर्गांत चोवीस हजार होते. १२ नवव्या
महिन्याचा नववा सरदार बन्यामिनी वंशांतला अबि-
येजेर अनाथोथी हा होता; त्याच्या वर्गांत चोवीस
हजार होते. १३ दहाव्या महिन्याचा दहावा सरदार
जेरहवंशांतला महरय नटोफाथी हा होता; त्याच्या
वर्गांत चोवीस हजार होते. १४ अकराव्या महिन्याचा
अकरावा सरदार एफ्राइमाच्या वंशांतला बनाया पिरा-
थोनी हा होता; त्याच्या वर्गांत चोवीस हजार होते.
१५ बाराव्या महिन्याचा बारावा सरदार अथनिएल
वंशांतला हेल्दय नटोफाथी हा होता; त्याच्या वर्गांत
चोवीस हजार होते.

१६ आणखी इस्राएलाच्या वंशांवरले हे अधिकारी
होते: रऊबेनवंशाचा अधिकारी जिख्रीचा पुत्र अली-
येजर हा होता; शिमोनवंशाचा अधिकारी माकाचा
पुत्र शफट्या हा होता, १७ लेवीवंशाचा अधिकारी कमु-
वेलाचा पुत्र हशब्या; अहरोनवंशाचा अधिकारी सादोक;
१८ यहूदावंशाचा अधिकारी दाविदाच्या भाऊबंदांतला
अलीहू; इस्साखारवंशाचा अधिकारी मीखाएलाचा
पुत्र अम्री; १९ जबुलूनवंशाचा अधिकारी ओबद्याचा
पुत्र इश्मया; नफतालीवंशाचा अधिकारी अज्रीएलाचा
पुत्र यरीमोथ; २० एफ्राइमवंशाचा अधिकारी अज-
ऱ्याचा पुत्र होशेय; मनश्शाच्या अर्ध्या वंशाचा अधिकारी
पदायाचा पुत्र योएल; २१ गिलादांतल्या मनश्शाच्या
अर्ध्या वंशाचा अधिकारी जखऱ्याचा पुत्र इद्दो; बन्या-
मीनवंशाचा अधिकारी अबनेराचा पुत्र यासिएल;
२२ दानवंशाचा अधिकारी यरोहामाचा पुत्र अजरेल;
हे इस्राएलाच्या वंशांचे सरदार होते. २३ तथापि
दाविदानें वीस वर्षांचे व त्यांहून कमी वयाचे लोक
यांची गणती केली नाहीं, कारण इस्राएलाची संख्या
आकाशांतील ताऱ्यांप्रमाणें वाढवीन असें परमेश्वरानें
म्हटलें होतें. २४ सरूवेचा पुत्र यवाब हा गणती करूं
लागला, पण त्यानें तें काम पूर्ण केलें नाहीं; कारण
त्यामुळें देवाचा कोप इस्राएलावर भडकला; ही गणती
दावीद राजाच्या बखरींत लिहिलेली नाहीं.

२५ राजाच्या भांडारांवर अदीएलाच्या पुत्र
अज्मावेथ हा होता; आणि शेतांतल्या, नगरांतल्या,
गांवांतल्या व किल्ल्यांतल्या भांडारांवर उज्जीयाचा
पुत्र योनाथान हा होता; २६ जमिनीची लागवड
करणाऱ्या शेतकऱ्यांवर कलूबाचा पुत्र एज्री हा होता;

२७ द्राक्षींच्या मळ्यांवर शीमी रामाथी हा होता;
आणि द्राक्षींच्या मळ्यांच्या उत्पन्नावर व द्राक्षारसाच्या
कोठ्यांवर जब्दी शिफमी हा होता; २८ जैतून झाडांवर
व सखल प्रदेशांतील उंबराच्या झाडांवर बाल-हानान
गदेरी हा होता; तेलाच्या कोठ्यांवर योवाश हा
होता; २९ जीं गुरें शारोनांत चरत असत त्यांवर
शित्रय शारोनी हा होता; खोऱ्यांतल्या गुरांवर अदलय
याचा पुत्र शाफाट हा होता; ३० उंटांवर ओबील
इस्माएली हा होता; गाढवांवर येहद्या मेरोनोथी
हा होता; ३१ आणि मेंढरांवर याजीज हाग्री हा
होता; हे दावीद राजाच्या धनावर अधिकारी होते.
३२ दाविदाचा चुलता योनाथान हा मंत्री असून
मोठा समजूतदार व लेखक होता; हख्मोन्याचा पुत्र
यहीएल राजपुत्रांबरोबर असे; ३३ अहीथोफेल
हा राजाचा मंत्री होता; आणि हूशय अर्की हा
राजाचा मित्र होता. ३४ अहीथोफेलाच्या मागून
बनायाचा पुत्र यहोयादा व अब्याथार हे मंत्री झाले;
आणि राजाचा सेनापति यवाब हा होता.

## २८

१ इस्राएलाचे सर्व सरदार म्हणजे वंशा-
वंशाचे सरदार राजाची पाळीपाळीनें सेवा
करणाऱ्या तुकड्यांचे सरदार होते; तसेंच
सहस्रपति, शतपति, राजा व त्याचे पुत्र यांच्या
पश्वादि धनावर देखरेख करणारे सरदार आणि शूर
वीर या सर्वांस दाविदानें यरुशलेमास जमविलें. २ मग
दावीद राजा उभा राहून म्हणाला, माझे बांधव
व माझे प्रजाजनहो, माझें म्हणणें ऐका; परमेश्वराच्या
कराराच्या कोशासाठीं आणि आपल्या देवाच्या पादा-
सनासाठीं एक विश्रामभवन बांधावें असा माझा मानस
असून तें बांधण्याची मीं तयारी केली होती; ३ परंतु
देवानें मला म्हटलें माझ्या नामाप्रीत्यर्थ तुला मंदिर
बांधावयाचें नाहीं, कारण तूं युद्धप्रिय असून रक्तपात
केला आहे; ४ परंतु इस्राएलाचा देव परमेश्वर यानें
माझ्या वडिलांच्या सर्व घराण्यांतून मलाच निवडिलें
आहे; मीं इस्राएलावर कायमचा राजा व्हावें म्हणून
यहूदानें अग्रणी व्हावें आणि यहूदाच्या घराण्यांत
माझ्या पित्याचें घराणें प्रमुख व्हावें अशी त्यानें
निवड केली आणि माझ्या पित्याच्या पुत्रांतून मलाच
सर्व इस्राएलावर राजा करावें असें त्याच्या मर्जीस
आलें. ५ परमेश्वरानें मला बहुत पुत्र दिले आहेत, त्या
सर्वांतून इस्राएलावर राज्य करण्यासाठीं परमेश्वराच्या
राजासनावर बसावें म्हणून त्यानें माझा पुत्र शलमोन
यास निवडिलें आहे. ६ तो मला म्हणाला, तुझा
पुत्र शलमोन हा माझें मंदिर व अंगणें बांधील; त्याला
मीं आपला पुत्र निवडिलें आहे व मी त्याचा पिता
होईन. ७ तो जर माझ्या आज्ञा व निर्णय हल्लींच्या-
प्रमाणें निश्चयानें पाळील तर मी त्याचें राज्य निरंतर
स्थापीन. ८ तर आतां सर्व इस्राएलांसमक्ष, परमे-
श्वराच्या मंडळीसमक्ष, आमच्या देवाच्या विद्यमानें
तुमचा देव परमेश्वर याच्या सर्व आज्ञांकडे लक्ष
पुरवून त्या पाळा म्हणजे तुम्ही या उत्तम देशाचे
मालक व्हाल व आपल्यामागें आपल्या मुलांस हा
देश कायमचें वतन ठेवून जाल. ९ हे माझ्या पुत्रा,
शलमोना, तूं आपल्या बापाच्या देवाला ओळख
आणि सात्त्विक चित्तानें व मनोभावें त्याची सेवा कर;
परमेश्वर सर्वांचीं मनें पारखितो आणि त्यांत जे कांहीं
विचार व कल्पना उत्पन्न होतात त्या त्यास समजतात,
तूं त्याच्या भजनीं लागशील तर तो तुला प्राप्त होईल,
पण तूं त्याला सोडिलें तर तो तुझा कायमचा त्याग
करील. १० संभाळ, पवित्रस्थानाप्रीत्यर्थ मंदिर बांधावें
म्हणून परमेश्वरानें तुला निवडिलें आहे; हिंमत धरून
हें कार्य कर.
११ मग दाविदानें आपला पुत्र शलमोन यास
मंदिराची ओसरी, कोठड्या भांडारगृहें व त्यांवरील
कोठड्या, आंतील कोठड्या व दयासनाचें स्थान यांचा
नमुना दिला; १२ त्याप्रमाणें परमेश्वराच्या मंदिराचीं
अंगणें, चोहों बाजूंच्या कोठड्या, देवमंदिराचीं भांडारें
व समर्पित केलेल्या वस्तूंचीं भांडारें यांचे जे नमुने
दैवी आत्म्याच्या प्रेरणेनें त्यास मिळाले होते ते
सर्व त्यानें त्यास दिले. १३ त्याप्रमाणेंच याजक
व लेवी यांच्या कार्यक्रमाचा, परमेश्वराच्या मंदिरांतील

सेवेसंबंधाच्या सर्व कामाचा आणि सेवेसंबंधाच्या सर्व पात्रांचा बेत त्यानें त्याला सांगून दिला; १४ सर्व प्रकारची सेवा करण्यासाठीं सोन्याचीं पात्रें करण्यास सोनें आणि सर्व प्रकारच्या सेवेसाठीं लागणाऱ्या चांदीच्या पात्रांसाठीं चांदी त्यानें तोलून दिली; १५ सोन्याच्या दीपमाळा व त्यांचीं सोन्याचीं चाडीं, प्रत्येक दीपमाळ व तिचीं चाडीं यासाठीं प्रत्येकाच्या कामाप्रमाणें चांदी तोलून दिली; १६ समर्पित भाकरीच्या प्रत्येक मेजासाठीं सोनें तोलून दिलें व चांदीच्या मेजासाठीं चांदी तोलून दिली; १७ शुद्ध सोन्याचे कांटे, कटोरे व प्याले व सोन्याच्या प्रत्येक सुरईसाठीं सोनें, त्याप्रमाणेंच चांदीच्या प्रत्येक सुरईसाठीं चांदी तोलून दिली. १८ धूपवेदीसाठीं गाळलेलें सोनें तोलून दिलें, आणि करूब आपले पंख पसरून परमेश्वराच्या कराराचा कोश झाकीत, त्यांच्या रथाच्या नमुन्यासाठीं सोनें त्यानें दिलें. १९ परमेश्वराकडून जें कांहीं या नमुन्याप्रमाणें मला कळलें तें मीं सर्व समजून घेऊन लिहून दिलें आहे [ असें दाविदानें म्हटलें ]. २० मग दावीद आपला पुत्र शलमोन यास म्हणाला हिंमत बांध, धैर्य धर आणि हें कार्य कर; भिऊं नको, खचूं नको, कारण परमेश्वर देव, माझा देव तुझ्याबरोबर आहे; परमेश्वराच्या मंदिराच्या सेवेचें सर्व काम समाप्त होईपर्यंत तो तुला अंतरणार नाहीं, तुला सोडणार नाहीं. २१ पाहा, देवाच्या मंदिराच्या सेवेसाठीं याजक व लेवी यांचा कार्यक्रम नेमून दिला आहे आणि सर्व प्रकारची सेवा करण्यासाठीं हरप्रकारचें काम मनापासून करणारे कुशल पुरुषहि तुझ्यापाशीं असणार; त्याप्रमाणेंच सरदार लोक व सर्व प्रजाजन हे सर्वस्वीं तुझ्या हुकमांत असणार.

२९ १ नंतर दावीद राजानें सर्व सभेस म्हटलें; माझा पुत्र शलमोन सुकुमार बालक आहे, यासच देवानें निवडिलें आहे आणि काम तर मोठें आहे; कारण हें भवन मानवासाठीं नव्हे तर परमेश्वर देवासाठीं आहे. २ माझ्या देवाच्या मंदिराप्रीत्यर्थ सोन्याच्या वस्तूंसाठीं सोनें, चांदीच्या वस्तूंसाठीं चांदी, पितळेच्या वस्तूंसाठीं पितळ, लोखंडाच्या वस्तूंसाठीं लोखंड व लाकडी वस्तूंसाठीं लाकूड, गोमेदमणि, जडावयासाठीं रत्नें, जडावाच्या कामासाठीं रंगारंगाचे नग, हरतऱ्हेचीं रत्नें व संगमरवरी पाषाण यांची रेलचेल मीं आपलें सगळें बळ खर्चून केली आहे. ३ याशिवाय माझें चित्त माझ्या देवाच्या मंदिराकडे लागलें आहे, म्हणून पवित्र मंदिरासाठीं जो मीं संग्रह केला आहे त्याशिवाय आणखी माझा स्वतांचा सोन्यारुप्याचा निधि मी देवाच्या मंदिरास देतों; ४ मंदिराच्या भिंती मढवावयासाठीं तीन हजार किक्कार ओफीरचें सोनें व सात हजार किक्कार शुद्ध रुपें मी देतों; ५ सोन्याच्या वस्तूंसाठीं सोनें, चांदीच्या वस्तूंसाठीं चांदी हीं कारागिरांकडून बनवावयाच्या सर्व प्रकारच्या कामासाठीं मी देत आहें. तर परमेश्वरास आज स्वेच्छेनें वाहून घेण्यास कोण तयार आहे ? ६ तेव्हां पितृकुळांचे प्रमुख व इस्राएलाच्या वंशांचे सरदार, सहस्रपति, शतपति आणि राजाच्या घरचे कारभारी यांनीं स्वेच्छेनें देणग्या दिल्या; ७ देवाच्या मंदिराच्या कार्यासाठीं पांच हजार किक्कार सोनें व दहा हजार दारिकें[2] सोनें, दहा हजार किक्कार चांदी, अठरा हजार किक्कार पितळ व एक लाख किक्कार लोखंड त्यांनीं दिलें. ८ त्यांच्याजवळ रत्नें होतीं तीं त्यांनीं परमेश्वराच्या मंदिराच्या भांडारासाठीं देण्यास गेर्षोनी यहीएल याच्या हवालीं केलीं. ९ त्या समयीं लोकांस फार हर्ष झाला, कारण त्यांनीं प्रसन्न होऊन खऱ्या मनानें व स्वेच्छेनें परमेश्वराप्रीत्यर्थ तीं अर्पणें केलीं होतीं; दावीद राजासहि मोठा हर्ष झाला. १० दाविदानें सर्व मंडळीदेखत परमेश्वराचा धन्यवाद केला; तो म्हणाला, हे परमेश्वरा, आमचा पिता इस्राएल याच्या देवा, तूं सदासर्वकाळ धन्य आहेस. ११ हे परमेश्वरा, महिमा, पराक्रम, शोभा, विजय व वैभव हीं तुझींच; आकाशांत व पृथ्वीवर जें कांहीं आहे तें सर्व तुझेंच; हे परमेश्वरा, राज्यहि तुझेंच; तूं सर्वांहून श्रेष्ठ व उन्नत आहेस. १२ धन व मान तुजपासूनच प्राप्त होतात, व तूं सर्वांवर प्रभुत्व करितोस; सामर्थ्य व पराक्रम तुझ्याच

१ निर्गम २५:३९ पाहा. २ इब्री लोकांचें एक नाणें.

हातीं आहेत; लोकांस थोर करणें व सर्वांस सामर्थ्य देणें हें तुझ्याच हातीं आहे. १३ तर आतां आमच्या देवा, आम्ही तुझे आभार मानितों, तुझ्या प्रतापी नामाची स्तुति करितों. १४ आम्हांस या प्रकारें स्वेच्छेनें अर्पणें करितां यावीं असा मी कोण व माझे लोक तरी कोण? सर्व कांहीं तुझ्यापासून प्राप्त होतें; तुझ्याच हातून प्राप्त झालेलें आम्ही तुला देत आहों. १५ आम्ही आपल्या सर्व पूर्वजांप्रमाणें तुझ्यासमोर उपरी व परदेशी आहों; या भूतलावरील आमचे दिवस छायेप्रमाणें असतात; आमची कांहीं शाश्वती नाहीं. १६ हे परमेश्वरा, आमच्या देवा, हा जो मोठा निधि आम्हीं तुझ्या पवित्र नामाचें मंदिर बांधण्याकरितां जमविला आहे हा तुझ्याच हातून आम्हांस मिळाला आहे; हा सर्व तुझाच आहे. १७ माझ्या देवा, मला ठाऊक आहे कीं तुला हृदयाची पारख आहे; सरळता तुला पसंत आहे; मी तर आपल्या सरळ हृदयानें या सर्व वस्तु तुला आनंदानें समर्पिल्या आहेत; तुझे लोक जे येथें हजर आहेत त्यांनीं स्वेच्छेनें तुला अर्पणें केलीं आहेत हें पाहून मला मोठा आनंद वाटत आहे. १८ हे परमेश्वरा, आमचे पूर्वज अब्राहाम, इसहाक व इस्राएल यांच्या देवा, तुझ्या प्रजाजनांच्या हृदयाच्या ठायीं हे विचार व ह्या कल्पना निरंतर वागतील व त्यांचीं मनें तुजकडे नेहमीं लागतील असें कर; १९ माझा पुत्र शलमोन यास असें सात्त्विक मन दे कीं त्यानें तुझ्या आज्ञा, तुझे निर्बंध व तुझे नियम पाळून हें सर्व कांहीं करावें आणि ज्या मंदिराची मीं तयारी केली आहे तें बांधावें; २० मग दावीद सर्व मंडळीस म्हणाला, तुम्ही आपला देव परमेश्वर याचा धन्यवाद करा. तेव्हां सर्व मंडळीनें आपल्या पूर्वजांचा देव परमेश्वर याचा धन्यवाद केला आणि आपलीं मस्तकें लववून परमेश्वरास व राजास वंदन केलें. २१ दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यांनीं परमेश्वराप्रीत्यर्थ यज्ञ केले व होमबलि अर्पिले; त्यांनीं एक हजार बैल, एक हजार एडके व एक हजार कोकरें पेयार्पणांसहित अर्पून सर्व इस्राएलांकरितां विपुल यज्ञ केले; २२ त्यांनीं त्या दिवशीं परमेश्वरासमोर मोठ्या आनंदानें खाणेंपिणें केलें. नंतर त्यांनीं दावीद राजाचा पुत्र शलमोन याला दुसऱ्यांदा राजा नेमून परमेश्वरातर्फे अधिपति होण्यासाठीं त्याला व याजकाच्या कामासाठीं सादोकाला अभिषेक केला. २३ मग शलमोन आपला बाप दावीद याच्याऐवजीं राजा होऊन परमेश्वराच्या सिंहासनावर बिराजमान झाला व भाग्यवंत झाला; सर्व इस्राएल लोक त्याच्या आज्ञेंत असत. २४ सर्व सरदार, सर्व शूर वीर व दावीद राजाचे सर्व पुत्र शलमोन राजाचे अंकित झाले. २५ परमेश्वरानें शलमोनाचा सर्व इस्राएलादेखत अत्यंत उत्कर्ष केला आणि इस्राएलाच्या कोणत्याहि राजास पूर्वी प्राप्त झालें नव्हतें एवढें राजैश्वर्य त्याला दिलें.

२६ या प्रकारें इशायाचा पुत्र दावीद यानें सर्व इस्राएलावर राज्य केलें. २७ त्यानें चाळीस वर्षें इस्राएलावर राज्य केलें; हेब्रोनांत सात वर्षें व यरुशलेमांत तेहतीस वर्षें. २८ आयुष्य, धन व मान यांनीं संपन्न होऊन आणि चांगला वृद्ध होऊन तो मृत्यु पावला; त्याचा पुत्र शलमोन त्याच्या जागीं राजा झाला. २९ दावीद राजाचें साद्यंत वृत्त अथपासून इतिपर्यंत शमुवेल द्रष्टा याच्या ग्रंथांत, नाथान संदेष्टा याच्या ग्रंथांत आणि गाद द्रष्टा याच्या ग्रंथांत लिहिलें आहे; ३० त्याची सर्व कारकीर्द, त्याचा पराक्रम, त्याजवर व इस्राएलावर व देशोदेशींच्या राज्यांवर कायकाय प्रसंग गुदरले हेंहि त्यांत लिहिलें आहे.

# २ इतिहास



१ दाविदाचा पुत्र शलमोन हा आपल्या गादीवर
१ कायम झाला; त्याचा देव परमेश्वर त्याच्याबरोबर
होता; त्यानें त्यास अति थोर पदास चढविलें
२ शलमोनानें सर्व इस्राएलांना म्हणजे सहस्रपति,
शतपति, न्यायाधीश आणि सर्व इस्राएलांच्या पितृकुळांचे
सर्व नायक यांना सांगितल्यावरून ३ शलमोना-
सह सर्व मंडळी गिबोन येथल्या उच्च स्थानीं गेली; परमे-
श्वराचा सेवक मोशे यानें रानांत बनविलेला
देवाचा दर्शनमंडप तेथेंच होता. ४ दाविदानें देवाच्या
कोशासाठीं जें स्थल तयार केलें होतें तेथें
किर्याथ-यारीमाहून तो आणिला होता; त्यानें यरुशलेमांत
त्यासाठीं डेरा उभारिला होता. ५ बसलेल बिन उरी
बिन हूर यानें केलेली पितळेची वेदी परमेश्वराच्या
निवासमंडपापुढें असे; शलमोन मंडळीसह तिकडे
गेला. ६ दर्शनमंडपाजवळ, परमेश्वरासमोर जी
पितळेची वेदी होती तिच्याजवळ शलमोनानें जाऊन
तिच्यावर एक हजार होमबलि अर्पिले.
७ त्या रात्रीं देवानें शलमोनास दर्शन देऊन म्हटलें
कीं तुला काय वर हवा तो माग. ८ शलमोन देवास
म्हणाला, माझा बाप दावीद याजवर तुझी फार कृपा
असे व तूं मला त्याच्या जागीं राजा केलें आहे. ९ आतां
हे परमेश्वरा देवा, तूं माझा बाप दावीद यास दिलेलें
वचन पूर्ण कर; मातीच्या रज:कणाप्रमाणें संख्येनें विपुल
अशा प्रजेवर तूं मला राजा केलें आहे. १० या प्रजे-
समोर वर्तण्यास मला आतां चातुर्य व ज्ञान दे; तुझ्या
एवढ्या मोठ्या प्रजेचें शासन कोणाला करितां येईल?
११ देव शलमोनास म्हणाला, ज्याअर्थी असा तुझा
मानस आहे म्हणजे तूं धनसंपत्ति व ऐश्वर्य हीं मागितलीं
नाहींत, आपल्या वैऱ्यांचें प्राणहरण करण्याचें अथवा
दीर्घायुषी होण्याचें मागितलें नाहीं, तर ज्या लोकांवर मीं
तुला राजा नेमिलें आहे त्या माझ्या लोकांचें शासन करा-
वयास चातुर्य व ज्ञान एवढेंच तूं स्वत:साठीं मागितलीं,
१२ त्याअर्थी चातुर्य व ज्ञान हीं तर तुला देतोंच; यांखे-
रीज आणखी तुझ्यापूर्वी कोणाहि राजास प्राप्त झाली
नव्हती व तुझ्यानंतर कोणासहि कधीं प्राप्त व्हावयाची
नाहीं एवढी धनसंपत्ति व ऐश्वर्य मी तुला देईन. १३ मग
शलमोन गिबोन येथल्या उच्च स्थानाहून, दर्शनमंडपावरून
यरुशलेमास आला व तेथें इस्राएलावर राज्य करूं लागला.
१४ शलमोनानें रथ व राऊत यांचा संग्रह केला;
त्याच्यापाशीं चौदाशें रथ व बारा हजार राऊत झाले;
त्यांतले कांहीं रथ ठेवावयाच्या नगरांत व कांहीं यरुशले-
मांत आपल्याजवळ त्यानें ठेविले. १५ राजानें यरुशलेमांत
चांदी व सोनें धोंड्यांप्रमाणें आणि गंधसरू तळवटींतल्या
उंबराच्या झाडांप्रमाणें विपुल केले. १६ शलमोनाचे घोडे
मिसर देशांतून येत; राजाचे व्यापारी घोड्यांच्या एका-
एका तांड्याची किंमत ठरवून तांडेचे तांडे घेत;
१७ एकाएका रथास सहाशें शेकेल चांदी व एकाएका
घोड्यास दीडशें शेकेल चांदी देऊन ते मिसर देशाहून
आणीत; हित्ती व अरामी राजांसाठींहि असेच ते
व्यापारी आणीत.

१ शलमोनानें परमेश्वराच्या नामाप्रीत्यर्थ एक
२ मंदिर आणि एक राजमंदिरहि बांधावयाचें योजिलें.
२ शलमोनानें सत्तर हजार ओझेकरी, डोंगरांतून
धोंडे काढणारे ऐशीं हजार व त्यांजवर देखरेख
करण्यासाठीं तीन हजार सहाशें लोक मोजून काढिले.
३ शलमोनानें सोरेचा राजा हुराम[1] याला सांगून पाठविलें
कीं माझा बाप दावीद याच्याशीं आपण जसा व्यवहार
केला व त्याचें निवासमंदिर बांधण्यासाठीं गंधसरू पाठविले
तसाच व्यवहार माझ्याशीं करा. ४ पाहा, मी आपला देव
परमेश्वर याच्या नामाप्रीत्यर्थ एक मंदिर बांधीत आहें.

१ याचें नांव १ राजे ५:२ येथें हिराम असें आहे.

तें परमेश्वरास समर्पण करून त्याच्यासमोर सुगंधी
द्रव्यांनीं युक्त असा धूप जाळावा, नित्य समर्पित भाकर
तेथें ठेवावी आणि रोज सकाळीं व संध्याकाळीं, शब्बाथ-
दिनीं व चंद्रदर्शनीं आणि आमचा देव परमेश्वर यानें
नेमिलेल्या पर्वकाळीं होमबलि अर्पावे म्हणून तें मी
बांधीत आहें. इस्राएलांचा हा निरंतरचा विधि होय. ५ जें
मंदिर मी बांधीत आहें तें मोठें होणार, कारण
आमचा देव सर्व दैवतांहून मोठा आहे. ६ आकाश व
नभोमंडल यांत तो समावत नाहीं तर त्याच्याप्रीत्यर्थ
मंदिर बांधण्याची कोणास ताकद आहे? त्याच्या
निवासासाठीं मंदिर बांधण्याची माझी काय प्राज्ञा!
केवळ त्याच्यापुढें धूप जाळावा म्हणून मी हें मंदिर
बांधीत आहें. ७ तर माझा बाप दावीद यानें तरतूद
करून ठेविल्याप्रमाणें यहूदांत व यरुशलेमांत जे
कारागीर आहेत त्यांच्याबरोबर काम करण्यासाठीं सोनें,
रुपें, पितळ व लोखंड यांच्या कामांत आणि जांभळें,
किरमिजी व निळ्या रंगांचें कापड तयार करण्याच्या
कामांत निपुण आणि खोदींव काम जाणणारा असा एक
कारागीर मजकडे पाठवून द्या. ८ तशींच मजकडे लबा-
नोनाहून गंधसरू, देवदारु व रक्तचंदन यांचीं लाकडें
पाठवून द्या; मला ठाऊक आहे कीं आपल्या सेवकांस लबा-
नोन येथील झाडें कापण्याचें काम माहीत आहे; आपल्या
सेवकांबरोबर माझेहि सेवक राहून ९ माझ्यासाठीं
विपुल लाकूड तयार करितील; कारण जें मंदिर मी
बांधणार आहें तें भव्य होणार आहे. १० आपले जे
सेवक लाकडें कापितील त्यांस मी वीस हजार कोर[1]
झोडलेले गहूं, वीस हजार कोर जव, वीस हजार बथ
द्राक्षारस व वीस हजार बथ तेल देईन. ११ तेव्हां
सोराचा राजा हुराम यानें शलमोनास असें पत्रोत्तर
लिहिलें कीं परमेश्वराचें आपल्या प्रजेवर प्रेम आहे म्हणून
त्यानें आपणाला तिच्यावर राजा नेमिलें आहे. १२ हूरामानें
आणखी असें लिहिलें कीं आकाश व पृथ्वी यांचा
निर्माणकर्ता, इस्राएलाचा देव परमेश्वर धन्य; परमेश्वरा-
प्रीत्यर्थ मंदिर बांधण्याच्या आणि राजमंदिर बांधण्याच्या
कार्यासाठीं त्यानें दावीद राजास बुद्धिसंपन्न आणि
चातुर्य व अक्कल यांनीं मंडित असा पुत्र दिला आहे;
१३ तर मी आपला बाप हुराम याचा एक बुद्धिमान्
कारागीर पाठवीत आहें; १४ तो दानवंशांतील एका स्त्रीचा
पुत्र असून त्याचा बाप सोर येथला होता; तो सोनें,
चांदी, पितळ, लोखंड, पाषाण व लाकूड यांचें काम कर-
ण्यांत, जांभळें, निळें, तलम सणाचें किरमिजी कापड
तयार करण्यांत, कोणत्याहि प्रकारचें खोदकाम करण्यांत
व सर्व प्रकारचे नमुने तयार करण्यांत निपुण आहे.
आपल्या कारागिरांबरोबर व माझा स्वामी आपला बाप
दावीद याच्या कारागिरांबरोबर त्यास कामावर नेमा.
१५ आतां माझ्या स्वामींनीं गहूं, जव, तेल व
द्राक्षारस पाठवितों असें म्हटलें आहे, तर तीं त्यांनीं
आपल्या नोकरांकडे पाठवून द्यावीं, १६ जितक्या लाक-
डाचें आपणाला प्रयोजन आहे तेवढें लबानोनाहून कापून
त्याचे तराफे करून आमचे लोक जलमार्गानें याफो येथें
पोंचते करितील; तेथून तें आपण यरुशलेमास घेऊन
जावें. १७ शलमोनाचा बाप दावीद यानें इस्राएल देशांत
राहणाऱ्या सर्व उपरी लोकांची गणती केली होती,
त्याप्रमाणें शलमोनानें त्यांची गणती केली; तेव्हां ते
एक लक्ष त्रेपन्न हजार सहाशें भरले. १८ त्यांतून
त्यानें सत्तर हजार ओझेकरी, ऐशीं हजार पहाडांतले
धोंडे काढणारे व तीन हजार सहाशें त्यांजवर देखरेख
करणारे नेमिले.

३ १ मग परमेश्वरानें यरुशलेमास मोरिया
डोंगरावर शलमोनाचा बाप दावीद यास दर्शन
दिलें होतें त्या अर्णान यबूसी याच्या खळ्यांत
दाविदानें नेमिलेल्या स्थानीं मोरिया डोंगरावर मंदिर
बांधण्याचें काम शलमोनानें सुरू केलें. २ त्यानें आपल्या
कारकीर्दीच्या चौथ्या वर्षाच्या दुसऱ्या महिन्याच्या
द्वितीयेस कामास आरंभ केला. ३ शलमोनानें
देवाचें जें मंदिर बांधिलें त्याच्या पायाचें माप येणें-
प्रमाणें; त्याची लांबी जुन्या मापानें साठ हात व रुंदी
वीस हात. ४ मंदिरापुढल्या ओसरीची लांबी मंदिराच्या
रुंदीबरोबर वीस हात होती; त्याची उंची एकशें वीस

१ एक माप.

हात होती; शलमोनानें त्याची आंतील बाजू शुद्ध
सोन्यानें मढविली. ५ मंदिराच्या मोठ्या भागाच्या
छतास त्यानें देवदारु लाकडाची तक्तपोशी केली; ती
त्यानें शुद्ध सोन्यानें मढविली; तीवर खजुरीचे वृक्ष व
सांखळ्या यांची नकशी काढिली. ६ त्यानें तें मंदिर
मोलवान रत्नांनीं सुशोभित केलें; सोनें वापरलें तें
पर्वाइम येथलें होतें. ७ त्यानें तें मंदिर, त्याच्या तुळ्या,
उंबरठे, भिंती व कवाडें हीं सोन्यानें मढविलीं व
भिंतींवर करूब खोदविले. ८ मग त्यानें मंदिराचें परम-
पवित्र स्थान तयार केलें; त्याची लांबी मंदिराच्या
रुंदीबरोबर वीस हात होती; त्याची रुंदी वीस हात
होती; त्यानें तें सहाशें किक्कार शुद्ध सोन्यानें मढविलें.
९ सोन्याच्या खिळ्यांचें वजन पन्नास शेकेल होतें.
त्यानें वरच्या कोठड्याहि सोन्यानें मढविल्या. १० मग
मंदिराच्या परमपवित्रस्थानांत दोन करूब कोरून तयार
केले व ते सोन्यानें मढविले. ११ करूबांचे पंख एकंदर
वीस हात लांब होते; प्रत्येक करूबाचा एक पंख पांच
हात लांब असून तो मंदिराच्या भिंतीला लागला होता,
त्याचा दुसरा पंख पांच हात लांब असून तो दुसऱ्या
करूबाच्या पंखाला लागला होता. १२ दुसऱ्या
करूबाचाहि एक पंख पांच हात लांब असून मंदिराच्या
दुसऱ्या भिंतीला लागला होता, आणि दुसरा पंखहि
पांच हात लांब असून पहिल्या करूबाच्या पंखाला
जडला होता. १३ त्या करूबांचे पंख वीस हात पसरले
होते; ते पायांवर उभे असून त्यांचीं मुखें आंतल्या
बाजूकडे होतीं. १४ मग त्यानें निळ्या, जांभळ्या व
किरमिजी रंगाच्या तलम कापडाचा अंतरपट केला
व त्यावर करूब काढिले. १५ मंदिरासमोर प्रत्येक
पस्तीस हात उंच असे दोन खांब त्यानें केले;
प्रत्येक खांबावरचा शिरस्क पांच पांच हात होता.
१६ मग त्यानें गाभाऱ्यासाठीं सांखळ्या करून खांबांला
लाविल्या व शंभर डाळिंबें करून खांबावर लटकाविलीं.
१७ हे खांब त्यानें मंदिरासमोर, एक उजव्या बाजूस
व दुसरा डाव्या बाजूस असे उभे केले; उजव्या
बाजूच्या खांबाचें नांव याखीम (तो स्थापील) व डाव्या
बाजूच्या खांबाचें नांव बवाज (त्याच्या ठायीं
सामर्थ्य) अशीं होतीं. १ मग त्यानें पितळेची
४ एक वेदी केली, तिची लांबीरुंदी वीस वीस
हात व उंची दहा हात होती. २ आणखी त्यानें
पितळ ओतून गंगाळसागर केला, या काठापासून त्या
काठापर्यंत त्याचा व्यास दहा हात होता; त्याचा आकार
वाटोळा होता, त्याची उंची पांच हात होती व त्याच्या
परिघाला तीस हात सूत लागे. ३ त्याच्याखालीं
सभोंवार एकएक हाताच्या अंतरावर दहादहा
बैलांच्या आकृति केल्या होत्या; त्या गंगाळाच्या
सभोंवार होत्या; गंगाळ ओतलें त्याबरोबर त्या बैलांच्या
दोन रांगा ओतलेल्या होत्या. ४ तें गंगाळ बारा
बैलांवर ठेविलें होतें, तीन बैल उत्तराभिमुख, तीन
पश्चिमाभिमुख, तीन दक्षिणाभिमुख व तीन पूर्वाभि-
मुख होते; त्यांच्यावर गंगाळसागर ठेविला होता; त्यांचीं
मागलीं अंगें आंतल्या बाजूस होतीं. ५ त्याची जाडी
चौंगाभर होती; त्याचें तोंड कटोऱ्याच्या तोंडासारखें
असून त्यावर कमलपुष्पांचें काम केलें होतें; त्यांत
तीन हजार बथ पाणी मावे. ६ त्यानें आणखी धुण्या-
साठीं दहा गंगाळें करून पांच उजवीकडे व पांच
डावीकडे ठेविलीं; त्यांत होमबलीच्या वस्तु धूत असत,
पण गंगाळसागर हा फक्त याजकांस धुण्यासाठीं असे.
७ त्यानें सोन्याच्या दहा समया विधिपूर्वक बन-
विल्या व त्या पांच उजवीकडे व पांच डावीकडे अशा
मंदिरांत ठेवून दिल्या. ८ तसेंच त्यानें दहा मेजें
करून उजवीकडे पांच व डावीकडे पांच अशीं मंदिरांत
ठेविलीं. त्यानें सोन्याचे शंभर कटोरे केले. ९ आणखी
त्यानें याजकांचें अंगण व एक मोठें अंगण अशीं केलीं;
अंगणाला दरवाजे करून त्यांचीं कवाडें पितळेनें
मढविलीं. १० त्यानें तो गंगाळसागर मंदिराच्या उजवी-
कडे आग्नेयीस ठेवून दिला. ११ हूरामानें हंडे,
पावडी व कटोरे केले. या प्रकारें हूरामानें शलमोन
राजासाठीं देवमंदिराचें जें काम करावयाचें होतें तें

१ निर्गम २५:३१ टीप पाहा.

१ एक माप.

संपविलें. १२ दोन खांब, त्यांवरील गोठ, दोहों खांबांच्या
शेंड्यांवरील कळस व ह्या खांबांच्या शेंड्यांवरच्या
कळसांचे दोन गोठ वेष्टिण्यासाठीं दोन जाळ्या
केल्या. १३ ह्या दोन जाळ्यांस चारशें डाळिंबें
आणि खांबांच्या कळसांचे दोन गोठ झाकण्यासाठीं
एकाएका जाळीसाठीं डाळिंबांच्या दोनदोन रांगा
केल्या. १४ त्यानें चौरंग करून त्यांवर गंगाळें बनवून
ठेविलीं; १५ एक गंगाळसागर व त्याच्याखालीं
बारा बैल केले. १६ हंडे, पावडी, कांटे इत्यादि सर्व
सामान परमेश्वराच्या मंदिरासाठीं शलमोन राजाकरितां
हूरामानें उजळ पितळेचें केलें. १७ राजानें तीं
यार्देन खोऱ्यांत सुक्कोथ व सरेदा यांच्यामधील
प्रदेशांतल्या चिकणमातींत ओतविलीं; १८ शलमोनानें
हीं पात्रें विपुल बनविलीं; पितळेचें वजन काढिलें
नाहीं. १९ आणखी शलमोनानें देवमंदिरांतलीं सर्व
पात्रें, सोन्याची वेदी, व समर्पित भाकरी ठेवण्याचीं मेजें;
२० दीपवृक्ष व त्यांचे शुद्ध सोन्याचे दिवे जे गाभाऱ्या-
समोर विधिपूर्वक जळत ठेवीत असत ते; २१ निर्मळ
सोन्याचीं फुलें, दिवे व चिमटे; २२ त्याप्रमाणेंच शुद्ध
सोन्याच्या कातरी, कटोरे, चमचे व धूपदानें हीं
बनविलीं; मग प्रवेशाकरितां परमपवित्र स्थानाच्या
आंतील कवाडें आणि मंदिराचीं कवाडें हीं सोन्याचीं
बनविलीं. १ या प्रकारें जें कांहीं काम परमेश्वराच्या
५ मंदिरासाठीं शलमोनानें हातीं घेतलें तें सर्व समाप्त
झालें. मग आपला बाप दावीद यानें समर्पिलेलें
सोनें, चांदी व सर्व पात्रें शलमोनानें आंत आणून
देवाच्या मंदिराच्या भांडारांत ठेविलीं.

२ मग शलमोनानें परमेश्वराच्या कराराचा कोश
दावीदपुरांतून म्हणजे अर्थात् सीयोनांतून वरतीं आणा-
वयासाठीं इस्राएलाचे वडील जन, वंशांचे सर्व मुख्य,
आणि इस्राएलाच्या पितृकुळांचे सरदार यांस यरुशलेमांत
जमा केलें. ३ सर्व इस्राएल पुरुष सातव्या महिन्यांतल्या
सणांत राजाजवळ जमा झाले. ४ इस्राएलाचे सर्व वडील
जन आले तेव्हां लेव्यांनीं कोश उचलून घेतला. ५ कोश,
दर्शनमंडप व मंडपांतील सर्व पवित्र पात्रें हीं लेवीय
याजकांनीं वरतीं वाहून नेलीं. ६ शलमोन राजा व
त्याजपाशीं जमलेली सर्व इस्राएल मंडळी यांनीं कोशा-
पुढें शेरडांमेंढरांचे व गुरांढोरांचे बलि इतके अर्पण
केले कीं त्यांची संख्या सांगतां किंवा करितां आली नाहीं.
७ मग याजकांनीं परमेश्वराच्या कराराचा कोश त्याच्या
स्थानीं म्हणजे मंदिराच्या गाभाऱ्यांत परमपवित्रस्थानांत
करूबांच्या पंखांखालीं त्याच्या ठिकाणीं नेऊन ठेविला.
८ कोशस्थानाच्या वर करूबांचे पंख पसरले होते; तो
कोश व त्याचे दांडे यांवर त्यांचें आच्छादन होतें.
९ त्याचे दांडे एवढे लांब होते कीं त्यांचीं शेवटें कोशां-
तून बाहेर आलेलीं गाभाऱ्यासमोर दिसत, पण बाहेरून
दिसत नसत; तो कोश आज दिवसपर्यंत तेथेंच आहे.
१० इस्राएल लोक मिसर देशांतून निघाल्यावर परमे-
श्वरानें त्यांच्याशीं करार केला त्या समयीं होरेबांत मोशानें
या कोशांत दोन पाट्या ठेविल्या होत्या, त्यांखेरीज त्यांत
दुसरें कांहीं नव्हतें. ११ याजक पवित्रस्थानांतून बाहेर
आले; जितके याजक हजर होते तितक्या सर्वांनीं
आपणांस पवित्र केलें होतें; त्यांनीं या वेळीं पाळ्यांचा
क्रम सोडिला होता. १२ जितके लेवी गाणारे होते, म्हणजे
अर्थात् आसाफ, हेमान व यदूथून, तितके सगळे आपल्या
पुत्रांसह व भाऊबंदांसह सणाचीं वस्त्रें लेऊन झांजा,
सारंग्या व वीणा घेऊन वेदीच्या पूर्व बाजूस उभे राहिले
व त्यांजबरोबर एकशें वीस याजक करणे वाजवीत होते.
१३ करणे वाजविणारे व गाणारे एका सुरानें परमे-
श्वराची स्तुति व धन्यवाद करूं लागले, आणि करणे, झांजा
आदिकरून वाद्यें वाजवून परमेश्वराची स्तुति ते उच्चस्वरें
करूं लागले; ती अशी : तो उत्तम आहे, त्याची दया
सनातन आहे. त्या समयीं परमेश्वराचें मंदिर मेघानें
व्यापिलें. १४ त्या मेघामुळें याजकांस सेवाचाकरी
करण्यास उभे राहवेना, कारण परमेश्वराच्या तेजानें
देवमंदिर भरून गेलें.

१ मग शलमोन म्हणाला, परमेश्वरानें म्हटलें
६ आहे, कीं मी निबिड अंधकारांत वास करीन;
२ पण तुझ्यासाठीं निवासस्थान, तुला युगानुयुग
राहाण्यासाठीं मंदिर मीं बांधिलें आहे. ३ मग राजानें

मागें वळून इस्राएलाच्या सर्व मंडळीस आशी-
र्वाद दिला, तेव्हां ती सर्व मंडळी उठून उभी राहिली.
४ तो म्हणाला, धन्य तो इस्राएलाचा देव परमेश्वर,
त्यानें स्वमुखानें माझा बाप दावीद यास वचन
दिलें होतें व त्यानें आपल्या हातांनीं तें पूर्ण केलें,
तें वचन असें: ५ ज्या दिवशीं मीं आपल्या
लोकांस मिसर देशांतून बाहेर आणिलें त्या दिवसा-
पासून माझ्या नामाच्या निवासार्थ मंदिर बांधण्यासाठीं
कोणाहि इस्राएल वंशाकडून मी अन्य कोणतेंहि नगर
निवडून घेतलें नाहीं, आणि माझी प्रजा इस्राएल
यांजवर अधिपत्य करण्यास कोणी अन्य मनुष्य
निवडिला नाहीं; ६ परंतु यरुशलेम येथें माझें नाम
असावें म्हणून मीं तें निवडिलें आहे. माझे लोक
इस्राएल यांजवर दाविदास मीं निवडून नेमिलें आहे.
७ माझा बाप दावीद याचा मनोदय असा होता कीं
इस्राएलाचा देव परमेश्वर याच्या नामाप्रीत्यर्थ एक मंदिर
बांधावें; ८ पण परमेश्वरानें माझा बाप दावीद यास
सांगितलें कीं परमेश्वराच्या नामाप्रीत्यर्थ मंदिर बांधावें
असा तूं मनोदय धरिला आहे हें तूं चांगलें केलें आहे;
९ पण तूं तें मंदिर बांधणार नाहींस, तर तुझ्या पोटीं
जो पुत्र येईल तो माझ्या नामाप्रीत्यर्थ मंदिर बांधील.
१० परमेश्वर हें जें वचन बोलला तें त्यानें पुरें केलें.
मी आपला बाप दावीद याच्या जागीं येऊन परमे-
श्वराच्या वचनानुसार इस्राएलाच्या गादीवर बसलों
आहें; आणि इस्राएलाचा देव परमेश्वर याच्या नामा-
प्रीत्यर्थ हें मंदिर मीं बांधिलें आहे. ११ परमेश्वरानें
इस्राएल लोकांशीं करार केला तो ज्या कोशांत आहे
त्याची मीं तेथें स्थापना केली आहे.

१२ इस्राएलाच्या सर्व मंडळीदेखत परमेश्वराच्या
वेदीसमोर उभें राहून शलमोनानं आपले हात पसरिले.
१३ शलमोनानं पांच हात लांब, पांच हात रुंद व
तीन हात उंच असा पितळेचा एक चौरंग तयार करून
अंगणाच्या मध्यभागीं टेविला होता, त्यावर तो उभा
राहिला आणि इस्राएलाच्या सर्व मंडळीसमक्ष गुडघे टेकून
आकाशाकडे आपले हात पसरून १४ असें म्हणाला:
हे परमेश्वरा, इस्राएलाच्या देवा, आकाशांत व पृथ्वीवर
तुझ्यासमान कोणी देव नाहीं; जे तुझे सेवक जिवेंभावें
तुझ्यासमोर वर्ततात त्यांच्याशीं तूं आपल्या करारा-
प्रमाणें व दयेनें वर्ततोस. १५ जें वचन तुझा सेवक
माझा बाप दावीद यास तूं दिलें तें तूं पाळिलें आहे; जें
तूं आपल्या मुखानें बोललास तें तूं आपल्या हातानें पुरें
केलें आहे; अशी आज वस्तुस्थिति आहे. १६ तर आतां
हे इस्राएलाच्या देवा, परमेश्वरा, तुझा सेवक माझा बाप
दावीद यास तूं असें वचन दिलें होतें कीं तूं मजसमोर
वागत आलास त्याप्रमाणेंच तुझे वंशज आपली चाल-
चलणूक ठेवण्याची काळजी बाळगून माझ्या नियमानुसार
चालतील तर माझ्यासमक्ष इस्राएलाच्या राजासनावर
बसणाऱ्या तुझ्या कुळांतल्या पुरुषांची परंपरा कधींहि
खुंटावयाची नाहीं; त्यास दिलेलें हें वचनहि तूं पुरें कर.
१७ हे इस्राएलाच्या देवा, परमेश्वरा जें वचन तूं
आपला सेवक दावीद यास दिलें होतें ते प्रचितीस येऊं
दे. १८ देव या भूतलावर मानवांबरोबर खरोखर वास
करील काय? आकाश व नभोमंडळ यांत तुझा समावेश
होत नाहीं; तर हें जें मंदिर मीं बांधिलें आहे यांत
तो कसा व्हावा? १९ तरी हे माझ्या देवा, परमेश्वरा,
तुझ्या सेवकाच्या प्रार्थनेकडे व याचनेकडे लक्ष दे;
तुझा सेवक तुझा धावा करीत आहे व तुजपुढें प्रार्थना
करीत आहे तिच्याकडे कान दे. २० माझ्या नामाचा
निवास येथें होईल असें ज्या स्थलाविषयीं तूं म्हटलें
त्या ह्या स्थलाकडे, या मंदिराकडे अहोरात्र तुझी दृष्टि
असो. जी प्रार्थना तुझा सेवक या स्थलाकडे तोंड करून
करीत आहे ती ऐक. २१ तुझ्या सेवकाच्या विनवणी-
कडे आणि तुझे लोक इस्राएल या स्थलाकडे तोंड करून
विनवणी करतील तिच्याकडे तूं कान दे; स्वर्गांतील तुझ्या
निवासस्थानांतून तूं ती श्रवण कर आणि श्रवण करून
त्यांना क्षमा कर. २२ एकाद्यानं आपल्या शेजाऱ्याचा
अपराध केल्यामुळें त्यास शपथ घ्यावयास लाविली,
आणि ती या मंदिरांत तुझ्या वेदीसमोर त्यानें घेतली,
२३ तर तूं स्वर्गलोकांतून ती श्रवण कर; त्याप्रमाणें
घडवून आण; आपल्या सेवकांचा न्याय करून दुष्टाची

कृति त्याच्या शिरीं उलटेल असें त्याचें पारिपत्य कर;
निर्दोष्यास निर्दोषी ठरवून त्याच्या निर्दोषतेप्रमाणें त्यास
फळ दे. २४ तुझे लोक इस्राएल यांनीं तुजविरुद्ध पाप
केल्यामुळें शत्रूंपुढें त्यांचा मोड झाला व ते पुन: तुजकडे
वळले, आणि तुझ्या नामाचा स्वीकार करून या मंदिरांत
तुझी प्रार्थना व विनवणी त्यांनीं केली, २५ तर तूं
स्वर्गलोकांतून त्यांचें ऐक; तुझे लोक इस्राएल यांच्या
पापाची क्षमा कर आणि जो देश तूं त्यांस व
त्यांच्या पूर्वजांस दिला त्यांत त्यांस परत आण.
२६ त्यांनीं तुजविरुद्ध पाप केल्यामुळें आकाशकपाटें
बंद होऊन पर्जन्यवृष्टि खुंटली तर अशा प्रसंगीं
त्यांनीं या स्थानाकडे तोंड करून प्रार्थना केली, तुझ्या
नामाचा स्वीकार केला व तूं त्यांस दीन केल्यामुळें
ते आपल्या पापापासून परावृत्त झाले, २७ तर तूं
स्वर्गलोकांतून त्यांचें ऐक. इस्राएल तुझी प्रजा, तुझे
सेवक, त्यांच्या पापाची क्षमा कर, कारण ज्या सन्मार्गानें
त्यांनीं चाललें पाहिजे तो तूं त्यांस शिकवीत आहेस;
हा जो देश तूं आपल्या लोकांस वतन करून दिला
आहे त्यावर पर्जन्यवृष्टि कर. २८ या देशावर दुष्काळ,
मरी, शेतें करपून टाकणारा वारा अथवा भेरड, टोळ
अथवा नाकतोडे हीं आलीं, अथवा शत्रूंनीं त्यांच्या
एकाद्या शहरास वेढा घातला अथवा दुसरी कोणतीहि
आपत्ति अथवा रोग त्यांजवर आला, २९ तर एकादा
इस्राएल किंवा तुझे सगळे इस्राएल लोक आपणांस होणारे
क्लेश किंवा दु:ख ओळखून जी प्रार्थना किंवा विनवणी
आपले हात या मंदिराकडे पसरून करितील, ३० ती
तूं स्वर्गांतील आपल्या निवासस्थानांतून ऐक, त्यांना
क्षमा कर; प्रत्येकाचें मन ओळखून त्याच्या सर्व वर्तना-
प्रमाणें त्यास फळ दे; कारण सर्व मानवजातीचीं मनें
ओळखणारा केवळ तूंच आहेस; ३१ म्हणजे जो देश
तूं आमच्या पूर्वजांस दिला त्यांत ते राहतील तितके
दिवस ते तुझें भय बाळगून तुझ्या मार्गांनीं चालतील.
३२ तुझ्या इस्राएल लोकांतला नव्हे असा कोणी
परदेशीय तुझें मोठें नाम, बलिष्ठ हस्त व पुढें केलेला
बाहु यांस्तव परदेशाहून आला, आणि त्यानें येऊन
ह्या मंदिराकडे तोंड करून प्रार्थना केली, ३३ तर तूं
आपल्या स्वर्गांतील निवासस्थानांतून ती ऐक व हा
परदेशीय ज्या कशासाठीं तुझा धावा करील तें कर;
म्हणजे या भूतलावरील सर्व देशचे लोक तुझें नाम
ओळखून तुझ्या इस्राएल लोकांप्रमाणें तुझें भय बाळ-
गितील आणि मीं जें हें मंदिर बांधिलें आहे त्यावर
तुझें नाम आहे हें त्यांस कळून येईल. ३४ तुझे लोक
तूं पाठविशील तिकडे आपल्या शत्रूंशीं सामना करण्यास
जातील आणि तूं निवडलेल्या या नगराकडे व तुझ्या
नामाकरितां मीं बांधिलेल्या या मंदिराकडे तोंड करून
तुझी प्रार्थना करितील, ३५ तर तूं स्वर्गांतून त्यांची
प्रार्थना व विनवणी ऐक व त्यांस न्याय दे. ३६ त्यांनीं
तुजविरुद्ध पाप केलें, ( कारण पाप करीत नाहीं असा
कोणीच नाहीं, ) व तूं त्यामुळें क्रोधाविष्ट होऊन त्यांस
त्यांच्या शत्रूंच्या हातीं दिलें आणि त्यांनीं त्यांस
जवळच्या अथवा दूरच्या देशीं पाडाव करून नेलें,
३७ तर ज्या देशांत त्यांस पाडाव करून नेलें असेल तेथें
ते विचार करितील आणि आपणांला पाडाव करून
नेणाऱ्या लोकांच्या देशांत तुजकडे वळून तुझी
विनवणी करून म्हणतील, आम्हीं पाप केलें आहे,
आम्ही कुटिलतेनें वागलों आहों, आम्हीं दुराचरण
केलें आहे; ३८ आणि ज्यांनीं त्यांस पाडाव करून नेलें
त्या त्यांच्या शत्रूंच्या देशीं ते तुजकडे जिवेंभावें वळून
आपल्या पूर्वजांस दिलेल्या देशाकडे, तूं निवडलेल्या
नगराकडे, तुझ्या नामाकरितां मीं बांधिलेल्या ह्या
मंदिराकडे तोंड करून तुझी प्रार्थना करितील; ३९ तेव्हां
तूं आपल्या स्वर्गांतील निवासस्थानांतून त्यांची प्रार्थना
व विनवणी ऐक; त्यांस न्याय दे; तुझ्या लोकांनीं तुझ्या-
विरुद्ध पाप केलें असेल त्यांस क्षमा कर. ४० तर आतां
हे माझ्या देवा, जी प्रार्थना ते या स्थानीं करितील
तिकडे आपले डोळे उघडून कान दे. ४१ हे परमेश्वरा,
देवा, ऊठ; तूं आपल्या सामर्थ्याच्या कोशासह आपल्या
विश्रामस्थानीं ये; हे परमेश्वरा, देवा, तुझे याजक
उद्धारानें भूषित होवोत आणि तुझे भक्त सुजनतेंत
आनंद पावोत. ४२ हे परमेश्वरा, देवा, तूं आपल्या

अभिषिक्ताचें तोंड मागें फिरवूं नको; तुझा सेवक
दावीद याच्यावर दया करून जीं कृत्यें तूं केलीं त्यांचें
स्मरण कर.

१ शलमोनानें प्रार्थना करणें संपविल्यावर स्वर्गां-
७ तून अग्नीनें येऊन होमबलि व यज्ञबलि भस्म केले;
आणि परमेश्वराच्या तेजानें तें मंदिर भरून गेलें;
२ याजकांस परमेश्वराच्या मंदिरांत जातां येईना, कारण
परमेश्वराच्या तेजानें तें भरून गेलें होतें. ३ अग्नि
खालीं आला आणि परमेश्वराचें तेज मंदिरावर फाकलें
तेव्हां सर्व इस्राएल लोक तें पाहत राहिले; जमिनी-
वरल्या फरसबंदीपर्यंत त्यांनीं आपलीं मुखें लववून
नमन केलें आणि परमेश्वर चांगला आहे, त्याची दया
सनातन आहे असें म्हणून त्यांनीं त्याचें उपकारस्मरण
केलें. ४ मग राजानें व सर्व लोकांनीं परमेश्वरासमोर
यज्ञबलि अर्पिले. ५ शलमोन राजानें बावीस हजार
बैल आणि एक लक्ष वीस हजार मेंढरें यांचा यज्ञ
केला. अशा रीतीनें राजानें व सर्व लोकांनीं देवाच्या
मंदिराचें प्रतिष्ठापन केलें. ६ याजक आपआपल्या
स्थानीं उभे राहिले; परमेश्वराची दया सनातन आहे
असें लेव्यांच्या द्वारें परमेश्वराचें उपकारस्मरण करण्या-
साठीं जीं वाद्यें दावीद राजानें परमेश्वराप्रीत्यर्थ केलीं
होतीं तीं घेऊन लेवीहि उभे राहिले; त्यांच्यापुढें याजक
करणे वाजवूं लागले आणि सर्व इस्राएल लोक उभे राहिले.
७ त्या दिवशीं राजानें परमेश्वराच्या मंदिराच्या पुढल्या
अंगणाचा मध्यभाग पवित्र करून तेथें होमबलि,
अन्नबलि आणि शांत्यर्पणांची वपा अर्पिली; कारण
शलमोनानें केलेल्या पितळेच्या वेदीवर होमबलि, अन्न-
बलि आणि वपा यांचा समावेश होईना. ८ त्या
प्रसंगीं शलमोनानें व त्याच्याबरोबर सर्व इस्राएल
लोकांनीं सात दिवस हा असा महोत्सव केला;
हमाथाच्या घाटापासून मिसराच्या नाल्यापर्यंतच्या
इस्राएलांचा मोठा जमाव जमला होता. ९ आठव्या
दिवशीं त्यांनीं उत्सवाचा समारोप केला; त्यांनीं वेदीच्या
समर्पणाप्रीत्यर्थ सात दिवस व उत्सवाप्रीत्यर्थ सात दिवस
पाळिले. १० राजानें सातव्या महिन्याच्या तेविसाव्या
दिवशीं लोकांस आपआपल्या डेऱ्यांकडे जावयास
निरोप दिला; परमेश्वरानें दाविदावर, शलमोनावर व
आपल्या इस्राएल प्रजेवर जी कृपा केली होती तीमुळें
ते आनंदित, हर्षितचित्त झाले होते.

११ या प्रकारें शलमोनानें परमेश्वराचें मंदिर व
राजमंदिर बांधण्याचें संपविलें आणि परमेश्वराच्या
मंदिरांत व आपल्या मंदिरांत जें कांहीं करावयाचें
त्यानें मनांत योजिलें होतें तें त्यानें उत्तम प्रकारें
सिद्धीस नेलें. १२ परमेश्वर शलमोनास रात्रीं दर्शन
देऊन म्हणाला, मीं तुझी प्रार्थना ऐकली आहे आणि
हें गृह यज्ञगृह व्हावें म्हणून मीं आपल्याकरितां
निवडिलें आहे. १३ पर्जन्यवृष्टि होऊं नये म्हणून मीं
जर आकाशकपाटें बंद केलीं, किंवा जमिनीचा उपज
फस्त करण्यासाठीं टोळधाड पाठविली, किंवा आपल्या
लोकांमध्यें मरी पाठविली, १४ तर माझें नाम ज्यांस
दिलें आहे त्या माझ्या लोकांनीं दीन होऊन माझी
प्रार्थना केली आणि माझ्या दर्शनाविषयीं उत्सुक होऊन ते
आपल्या दुष्ट मार्गापासून परावृत्त झाले तर मी स्वर्गांतून
त्यांची विनंति ऐकून त्यांच्या पापाची त्यांस क्षमा करीन
व त्यांच्या देशांतून क्लेश नाहींसे करीन. १५ जी प्रार्थना
या स्थानीं करण्यांत येईल तिच्याकडे माझे डोळे उघडे
राहतील व माझे कान लागतील. १६ ह्या मंदिरीं माझें
नाम सर्वकाळ राहावें म्हणून मीं हें निवडून पवित्र केलें
आहे; माझे नेत्र व माझें मन हीं येथें सतत लागलेलीं
राहतील. १७ जर तूं आपला बाप दावीद याच्याप्रमाणें
खऱ्या मनानें माझ्यासमोर वर्तलास, माझ्या सर्व
आज्ञांप्रमाणें वागलास, माझे विधि व नियम पाळिले,
१८ तर इस्राएलाच्या गादीवर आरूढ होणाऱ्या तुझ्या
कुळांतल्या पुरुषांची परंपरा खुंटावयाची नाहीं असा जो
करार मीं तुझा बाप दावीद याच्याशीं केला त्याप्रमाणें
मी तुझें राजपद स्थापीन; १९ पण जर तुम्ही बहकून
जे नियम व आज्ञा मीं तुम्हांस विहित केल्या
आहेत त्या न पाळाल आणि जाऊन अन्य देवांचें

उपासना व त्यांचें भजनपूजन कराल, २० तर जो
देश मीं इस्राएल लोकांस दिला आहे त्यांतून त्यांचें
निर्मूलन करीन आणि हें जें मंदिर मीं आपल्या
नामाप्रीत्यर्थ पवित्र केलें आहे तें माझ्या नजरेआड
करीन; आणि तें इतर सर्व राष्ट्रांत दृष्टांताचा व
निंदेचा विषय करीन; २१ आणि हें मंदिर उच्च
स्थानीं राहील तरी याच्याजवळून जाणारेयेणारे चकित
होऊन म्हणतील, परमेश्वरानें या देशाचें व या
मंदिराचें असें कां केलें? २२ तेव्हां लोक म्हणतील,
त्यांच्या वाडवडिलांचा देव परमेश्वर ज्यानें त्यांस मिसर
देशांतून आणिलें त्यास सोडून ते अन्य देवांच्या नादास
लागले व त्यांचें भजनपूजन व उपासना करूं लागले
त्यामुळें त्यानें ही सर्व विपत्ति त्यांजवर आणिली आहे.
१ शलमोनास परमेश्वराचें मंदिर व आपलें
८ मंदिर बांधावयास वीस वर्षें लागलीं. २ त्यानंतर जीं
नगरें हूराम यानें शलमोनास दिलीं होतीं त्यांची
त्यानें मजबुती केली व तेथें इस्राएल लोकांस वसविलें.
३ मग शलमोनानें हमाथ-सोबा नगरावर चाल करून
तें हस्तगत केलें. ४ त्यानें रानांतील तदमोर आणि
हमाथांतील सर्व भांडारनगरें यांची मजबुती केली.
५ त्यानें वरचें बेथ-होरोन व खालचें बेथ-होरोन ह्या
दोन्ही तटबंदी नगरांची मजबुती कोट, वेशी व अडसर
यांनीं केली; ६ बालाथ नगर, शलमोनाचीं सर्व भांडार-
नगरें आणि त्याचे रथ व स्वार ठेवण्याचीं नगरें या सर्वांची
मजबुती केली; त्याप्रमाणेंच यरुशलेमांत, लबानोनांत व
आपल्या राज्याच्या सर्व प्रदेशांत जें कांहीं शलमोनाला
बांधकाम करावेंसें वाटलें तें सर्व त्यानें केलें. ७ हित्ती,
अमोरी, परिज्जी, हिव्वी व यबूसी यांच्यांतले जे अव-
शिष्ट लोक इस्राएल लोकांपकीं नव्हते ८ त्यांचे कांहीं
वंशज त्यांच्या पश्चात् देशांत राहून गेले होते व त्यांस
इस्राएल लोकांच्यानें अगदीं नष्ट करवलें नव्हतें;
अशांवर शलमोनानें वेठबिगार बसविली; आजवर
तसेंच चाललें आहे. ९ इस्राएल लोकांपैकीं कोणा-
सहि शलमोनानें आपल्या कामासाठीं दास करून ठेविलें
नाहीं; ते योद्धे, सरदार, सेनापति, रथ व स्वार
यांवरचे अधिकारी होते. १० लोकांवर हुकमत चाल-
विणारे शलमोनाचे नायक अडीचशें होते. ११ मग
शलमोनानें जें मंदिर फारोच्या कन्येसाठीं बांधिलें
होतें त्यांत तिला दावीदपुराहून आणिलें; तो म्हणाला,
ज्या ज्या ठिकाणीं परमेश्वराचा कोश आला आहे तीं तीं
स्थानें पवित्र होत; म्हणून माझी पत्नी इस्राएलाचा राजा
दावीद याच्या मंदिरांत राहतां कामा नये.
१२ मग शलमोनानें देवडीसमोर बांधिलेल्या वेदीवर
परमेश्वराप्रीत्यर्थ होमार्पण केलें; १३ मोशाच्या
आज्ञेस अनुसरून नित्यविधीप्रमाणें शब्बाथवारीं,
चंद्रदर्शनीं, आणि बेखमीर भाकरीचा सण, सप्तकांचा
सण व मांडवांचा सण या तीन नेमिलेल्या वार्षिक
सणांत तो होमबलि अर्पीत असे. १४ त्यानें आपला
बाप दावीद याच्या नियमानुसार याजकांच्या सेवेचे
वर्ग नेमिले आणि स्तुति करण्यास व याजकांच्या
देखरेखीखालीं सेवाचाकरी करण्यास त्यानें लेव्यांसहि
प्रत्येक दिवसाच्या विधीप्रमाणें त्यांच्या त्यांच्या कामांवर
नेमिलें; प्रत्येक द्वारापाशीं द्वारपाळांच्या पाळ्या ठरविल्या;
कारण देवाचा माणूस दावीद यानें अशीच आज्ञा केली
होती. १५ भांडारांसंबंधानें अथवा अन्य कोणत्याहि
बाबतींत राजानें याजक व लेवी यांस जी आज्ञा दिली
होती ती ते अवमानीत नसत. १६ परमेश्वराच्या
मंदिराचा पाया घातला तेव्हांपासून तें पुरें होईपर्यंत
शलमोनाचें सर्व काम सिद्धीस गेलें. अशा प्रकारें
परमेश्वराचें मंदिर पुरें झालें.
१७ मग शलमोन अदोम देशांत समुद्रतीरीं
एस्योन-गेबेर व एलोथ या नगरांत गेला. १८ हूरामानें
त्याजकडे आपल्या सेवकांच्या हातीं गलबतें व
दर्यावर्दी लोक पाठविले; त्यांनीं शलमोनाच्या कामदारां-
बरोबर ओफिरास जाऊन चारशें पन्नास किक्कार सोनें
शलमोनास आणून दिलें.
१ शलमोनाची कीर्ति झाली ती ऐकून शबाची
९ राणी बरोबर मोठा लवाजमा घेऊन आणि विपुल
सोनें, मोल्यवान रत्नें व मसाले उंटांवर लादून
कूटप्रश्नांनीं त्याची परीक्षा पाहावयास यरुशलेमास आली.

शलमोनाकडे आल्यावर आपल्या मनांत जें कांहीं
होतें तें सर्व ती त्याजपुढें बोलली. २ शलमोनानें
तिच्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें दिलीं; त्यानें तिला उलगडा
करून सांगितली नाहीं अशी एकहि गोष्ट नव्हती.
३ शलमोनाचें सगळें शहाणपण, त्यानें बांधिलेलें मंदिर,
४ त्याच्या मेजवानीचीं पक्वान्नें, त्याच्या कामदारांचीं
आसनें, त्याच्या मानकऱ्यांची खिदमत व त्यांचे पोषाक;
त्याचे प्यालेबरदार व त्यांचे पोषाक आणि परमेश्वराच्या
मंदिरांत चढून जावयाचा त्याचा तो जिना, हीं सगळीं
पाहून ती गांगरून गेली. ५ ती राजास म्हणाली,
आपली करणी व ज्ञान यांविषयींची कीर्ति मीं
आपल्या देशीं ऐकली ती खरी आहे; ६ तथापि मीं
येऊन प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिल्याशिवाय या गोष्टींचा
मला विश्वास येईना; आतां पाहावें तों आपल्या ज्ञानाची
अर्धीहि थोरवी माझ्या कानीं आली नव्हती. आपली
कीर्ति झाली आहे तीहून आपण अधिक आहां. ७ धन्य
आपले लोक, धन्य हे आपले सेवक; त्यांना आपल्यासमोर
सतत तिष्ठत राहून आपल्या शहाणपणाचा लाभ घडत
असतो. ८ धन्य आपला देव परमेश्वर; त्यानें आपणावर
प्रसन्न होऊन आपल्या वतीनें आपण राजा व्हावें
म्हणून आपणाला आपल्या गादीवर स्थापिलें आहे;
आपल्या देवानें इस्राएलावर प्रेम करून त्यांची
कायमची स्थापना करण्याचें म्हणून न्यायाचें व
धर्माचें पालन करण्यासाठीं त्यानें आपणाला राजा केलें
आहे. ९ तिनें राजास एकशें वीस किक्कार सोनें,
विपुल सुगंधी द्रव्यें व बहुमोल रत्नें नजर केलीं;
शबाच्या राणीनें शलमोन राजास जीं सुगंधी द्रव्यें
नजर केलीं त्यांसारखीं पुनः कधीं कोठून आलीं
नाहींत. १० हूरामाचे कामदार ओफीर येथून सोनें
आणीत, त्याप्रमाणेंच रक्तचंदनाचें लाकूड आणि
बहुमोल रत्नेंहि आणीत. ११ राजानें रक्तचंदनाच्या
लाकडाचे परमेश्वराच्या मंदिराला व राजवाड्याला
चबुतरे केले; त्याप्रमाणेंच गाणाऱ्यांसाठीं त्याच्या वीणा
व सारंग्या बनविल्या; असल्या वस्तु त्यापूर्वी यहूदा
देशांत पाहण्यांत आल्या नव्हत्या. १२ शबाच्या राणीनें
जें जें मागितलें तें तें सगळें शलमोन राजानें तिला
तिच्या मनीषेप्रमाणें दिलें; शिवाय तिनें जो नजराणा
आणिला होता त्याच्या इतक्या मोलाची देणगी तिला
दिली. मग ती आपल्या परिवारासह स्वदेशीं परत गेली.
१३ प्रतिवर्षी शलमोनाकडे सोनें येई तें सहाशें
सहासष्ट किक्कार भरे, १४ याखेरीज आणखी सौदागर
व व्यापारी आणीत; आणि अरबस्तानचे सर्व राजे व
देशाचे सुभेदार शलमोनाकडे सोनें चांदी आणीत.
१५ शलमोन राजानें सोन्याचे पत्रे ठोकून दोनशें
मोठ्या ढाली बनविल्या, एकेका ढालीस सहाशें शेकेल
सोनें लागलें. १६ त्याप्रमाणेंच त्यानें सोन्याचे पत्रे ठोकून
तीनशें लहान ढाली केल्या; प्रत्येक लहान ढालीस
तीनशें शेकेल सोनें लागलें; राजानें या ढाली लबानोन
वनगृहांत ठेविल्या. १७ राजानें एक मोठें हस्तिदंती
सिंहासन बनविलें, व तें शुद्ध सोन्यानें मढविलें.
१८ सिंहासनास सहा पायऱ्या आणि सोन्याचें पादपीठ
हीं लाविलीं; सिंहासनाच्या दोन्ही बाजूंस हात होते, व
ह्या दोन हातांच्या बाजूंला दोन सिंह केले. १९ त्या सहा
पायऱ्यांच्या दोन्ही बाजूंस एकेक सिंह असे एकंदर बारा
सिंह केले; दुसऱ्या कोणत्याहि राज्यांत यासारखें केलेलें
सिंहासन नव्हतें. २० शलमोन राजाचीं सर्व पानपात्रें
सोन्याचीं होतीं; लबानोनी वनगृहांतील सर्व पात्रें शुद्ध
सोन्याचीं होतीं; शलमोनाच्या वेळीं चांदीला कोणी
विचारीत नसे. २१ हूरामाच्या कामदारांबरोबर राजाचीं
जहाजें तार्शीशास जात असत; तीन तीन वर्षांनीं हीं
तार्शीशास जाणारीं जहाजें सोनें, चांदी, हस्तिदंत, वानर
व मोर आणीत असत. २२ शलमोन राजा धन व
शहाणपण या बाबतींत पृथ्वीवरल्या सर्व राजांहून श्रेष्ठ
होता. २३ देवानें शलमोनाच्या ठायीं शहाणपण ठेविलें
होतें तें ऐकण्यास अखिल पृथ्वीवरले राजे त्याच्या
दर्शनास येत. २४ प्रत्येक मनुष्य चांदीचीं व सोन्याचीं
पात्रें, उंची वस्त्रें, शस्त्रें, सुगंधी द्रव्यें, घोडे व खेचरें यांचा
नजराणा वर्षानुवर्ष आणीत असत. २५ शलमोनाचे
घोडे व रथ यांचीं चार हजार ठाणीं होतीं; त्याच्या-
जवळ बारा हजार राऊत होते; त्यांतले कांहीं, रथ

ठेवावयाच्या नगरांत व कांहीं यरुशलेमांत आपल्याजवळ
त्यानें ठेविले. २६ फरात नदापासून पलिष्टयांचा देश
व मिसर देशाची सरहद्द येथवरल्या सर्व राजांवर
त्याचें प्रभुत्व असे. २७ राजानें यरुशलेमांत चांदी
धोंड्यांप्रमाणें आणि गंधसरू तळवटींतल्या उंबरांच्या
झाडांप्रमाणें विपुल केले. २८ लोक मिसराहून व इतर
सर्व देशांहून शलमोनासाठीं घोडे आणीत.

२९ शलमोनाचीं अथपासून इतिपर्यंत एकंदर
सर्व कृत्यें नाथान संदेष्टयाच्या ग्रंथांत, शिलोनिवासी
अहीया याच्या संदेशलेखांत आणि नबाटपुत्र
यराबाम याजविषयींच्या इद्दोकृत दृष्टांतग्रंथांत
लिहिलेलीं आहेत, नाहींत काय? ३० शलमोनानें
यरुशलेमांत अवघ्या इस्राएलांवर चाळीस वर्षे राज्य
केलें. ३१ शलमोन आपल्या पितरांजवळ जाऊन
निजला व त्यास त्याचा बाप दावीद याच्या नगरांत
मूठमाती दिली; त्याचा पुत्र रहबाम त्याच्या जागीं
राजा झाला.

१० १ रहबाम शखेमास गेला, कारण त्याला
राजा करण्यासाठीं सर्व इस्राएल तेथें गेले होते.
२ नबाटाचा पुत्र यराबाम हा शलमोन राजा-
समोरून पळून जाऊन मिसर देशांत राहिला होता तेथें
त्यानें हें ऐकलें. ३ मग लोकांनीं त्याला बोलावून
आणिलें; तेव्हां यराबाम व इस्राएलाची सर्व मंडळी
रहबामाकडे येऊन म्हणाली, ४ आपल्या बापानें
आमच्यावर जूं ठेविलें होतें तें भारी होतें; तर आतां
आपल्या बापानें आम्हांवर लादिलेलें कठिण दास्य व
भारी जूं हलकें करा म्हणजे आम्ही आपले ताबेदार
होऊं. ५ त्यानें त्यांस सांगितलें, आतां जा आणि
तीन दिवसांनीं मजकडे परत या; हें ऐकून ते गेले.
६ रहबाम राजानें आपला बाप शलमोन जीवंत असतां
जे वृद्ध मनुष्य त्याच्या पदरीं होते त्यांचा सल्ला
घेतला; तो म्हणाला, या लोकांला उत्तर देण्याच्या
बाबतींत तुम्ही मला काय मसलत देतां? ७ ते त्यास
म्हणाले, आपण या लोकांवर मेहरनजर करून यांस संतुष्ट
राखाल आणि मधुर शब्दांनीं उत्तर द्याल
तर हे आपले सर्वकाळ सेवक होऊन राहतील. ८ पण
वृद्ध पुरुषांनीं दिलेला सल्ला रहबामानें टाकून त्याच्या-
बरोबर लहानाचे मोठे झालेले तरुण पुरुष त्याच्या
पदरीं होते त्यांचा सल्ला घेतला. ९ त्यानें त्यांस
विचारिलें, तुमच्या बापानें आमच्यावर ठेविलेलें जूं
हलकें करा असें म्हणणाऱ्या या लोकांस उत्तर
देण्याच्या बाबतींत तुम्ही मला काय सल्ला देतां?
१० त्याच्याबरोबर लहानाचे मोठे झालेल्या त्या
तरुण पुरुषांनीं त्यास उत्तर दिलें, हे लोक आपल्याला
म्हणतात कीं आपल्या बापानें आम्हांवर भारी जूं लादिलें
होतें तर आतां आपण तें हलकें करा, तर त्यांस असें सांगा
कीं माझी करांगुलि माझ्या बापाच्या कमरेपेक्षां मोठी
आहे. ११ माझ्या बापानें तुमच्यावर भारी जूं लादिलें
तें मी आणखी भारी करणार; माझा बाप तुम्हांस
आसुडांनीं ताडन करीत असे, तर मी तुम्हांस विंचवांनीं
ताडन करीन. १२ तिसऱ्या दिवशीं मजकडे यावें
असें राजानें त्यांस सांगितलें होतें त्याप्रमाणें तिसऱ्या
दिवशीं यराबाम व सगळे लोक रहबामाकडे आले.
१३ तेव्हां रहबाम राजानें त्यांस कठोरपणानें जबाब
दिला आणि वृद्ध पुरुषांचा सल्ला टाकून १४ त्या
तरुण पुरुषांच्या सल्ल्याप्रमाणें तो त्यांस म्हणाला,
माझ्या बापानें तुमच्यावर भारी जूं लादिलें होतें,
पण मी तें अधिक भारी करणार; माझा बाप तुम्हांस
असुडांनीं ताडन करीत असे, तर मी तुम्हांला विंचवांनीं
ताडन करीन. १५ या प्रकारें राजानें लोकांचें
ऐकलें नाहीं; याचें कारण हेंच कीं जें वचन परमे-
श्वरानें शिलोकर अहीया याच्याद्वारें नबाटाचा पुत्र
यराबाम यास दिलें होतें तें पूर्ण व्हावें अशी देवाची
योजना होती. १६ राजा ऐकत नाहीं हें पाहून
सगळ्या इस्राएल लोकांनीं त्याला म्हटलें, दाविदाचें
आम्ही काय लागतों? इशायाचा पुत्र आमचा वतन-
भाग नाहीं; हे इस्राएला, आपल्या डेऱ्यांकडे चालता
हो; दाविदा, आतां तूं आपलें घर संभाळ. मग सर्व
इस्राएल लोक आपापल्या डेऱ्यांस चालते झाले. १७ जे
इस्राएल लोक यहूदाच्या नगरांत वस्ती करून राहिले

होते त्यांजवर मात्र रहबामानें राज्य केलें. १८ रहबाम
राजानें वेठीस धरलेल्या लोकांची देखरेख करणारा
हदोराम यास पाठविलें; त्यास इस्राएल लोकांनीं दगड-
मार करून ठार केलें. इकडे रहबाम राजा त्वरेनें
आपल्या रथांत बसून यरुशलेमास पळून गेला.
या प्रकारें इस्राएल लोकांनीं दाविदाच्या घराण्याशीं
फितुरी केली ती आजवर चालू आहे.

११

१ यरुशलेमास आल्यावर रहबामानें यहूदाचा
व बन्यामिनाचा वंश यांतून एकंदर एक
लक्ष ऐशीं हजार निवडक योद्धे जमा केले;
इस्राएलाशीं लढाई करून रहबामाच्या हातीं राज्य परत
यावें असा त्यांत हेतु होता. २ तेव्हां देवाचा माणूस
शमाया यास परमेश्वराचें असें वचन प्राप्त झालें कीं
३ यहूदाचा राजा शलमोनपुत्र रहबाम, यहूदा व
बन्यामीन यांच्या कुळांतले सर्व इस्राएल लोक यांस असें
सांग, ४ परमेश्वर म्हणतो, आपल्या बांधवांवर स्वारी
करून लढूं नका; तुम्ही सर्व आपआपल्या घरीं परत
जा; कारण ही माझी करणी आहे. त्यांनीं परमेश्वराचें
हें वचन ऐकलें व तदनुसार यराबामावर जावयाचें
सोडून ते सर्व परत गेले. ५ मग रहबाम यरुशलेमांत
राहूं लागला आणि यहूदाच्या संरक्षणासाठीं त्यानें पुढील
तटबंदीचीं नगरें बांधिलीं: ६ बेथलहेम, एटाम,
तकोवा, ७ बेथ-सूर, शोखो, अदुल्लाम, ८ गथ, मारेशा,
सीफ, ९ अदोरइम, लाखीश, अजेका, १० सोरा, अया-
लोन व हेब्रोन हीं यहूदांतलीं व बन्यामिनांतलीं तटबंदीचीं
नगरें त्यानें बांधिलीं. ११ त्यानें आणखी दुर्गांची तटबंदी
केली व त्यांवर नायक नेमिले आणि त्यांत अन्नसामग्री,
तेल व द्राक्षारस यांचा सांठा केला. १२ मग प्रत्येक
नगरांत त्यानें ढाली व भाले यांचा पुरवठा करून त्यांस
अधिक मजबुती आणिली. यहूदा व बन्यामीन हे तर
त्याचेच होते. १३ अखिल इस्राएलांतील याजक व
लेवी आपले सर्व प्रदेश सोडून त्याजकडे गेले. १४ या
प्रकारें सर्व इस्राएलांत लेवी आपलीं शिवारें व वतनें
सोडून यहूदा व यरुशलेम येथें आले; कारण त्यांनीं
परमेश्वराप्रीत्यर्थ याजकाचें काम करूं नये म्हणून
यराबाम व त्याचे पुत्र यांनीं त्यांस घालवून दिलें
होतें. १५ यराबामानें उच्च स्थानांसाठीं, बोकडांच्या
मूर्तीसाठीं व त्यानें केलेल्या वासरांच्या मूर्तीसाठीं
आपलेच याजक नेमिले. १६ इस्राएलाच्या सर्व
वंशांतले जे लोक इस्राएलाचा देव परमेश्वर याच्या
भजनीं मनोभावें लागले होते ते सर्व आपल्या
वडिलांचा देव परमेश्वर याच्यासमोर बलि अर्पण
करण्याकरितां लेव्यांच्या मागून यरुशलेमास आले.
१७ या प्रकारें त्यांनीं यहूदाचें राज्य स्थिर करून
शलमोनाचा पुत्र रहबाम यास तीन वर्षें बळकट केलें;
ते तीन वर्षेंपर्यंत दावीद व शलमोन यांच्या मार्गानें
चालले. १८ रहबामानें दावीदपुत्र यरीमोथ आणि
इशायपुत्र अलीयाब याची कन्या अबीहईल यांजपासून झाले-
ली महलथ हिजशीं विवाह केला; १९ तिच्या पोटीं त्यास
यऊश, शमऱ्या व जाहम हे पुत्र झाले. २० तिच्यामागून
त्यानें अबशालोमाची कन्या माका बायको केली; तिच्या
पोटीं त्यास अबीया, अत्थय, जीजा व शलोमीथ हीं मुलें
झालीं. २१ रहबाम आपल्या सर्व पत्नी व उपपत्नी
यांहून अबशालोमाची कन्या माका हिजवर अधिक
प्रीति करीत असे; त्यानें अठरा पत्नी व साठ उपपत्नी
केल्या व त्यास अठ्ठावीस पुत्र व साठ कन्या झाल्या.
२२ रहबामानें माकाचा पुत्र अबीया यास त्याच्या
सर्व बंधूंमध्यें मुख्य व सरदार नेमिलें; त्यास राजा
करावें असा त्याचा मानस होता. २३ तो मोठ्या
चतुराईनें वर्तला; त्यानें आपल्या सर्व पुत्रांस यहूदा व
बन्यामीन यांच्या सर्व प्रदेशांतील प्रत्येक तटबंदी
नगरांत निरनिराळे ठेविलें व त्यांस खाण्यापिण्याची
विपुल सामग्री पुरविली व पुष्कळ बायका करून दिल्या.

१२

१ रहबामाचें राज्य स्थिर झालें व तो प्रबळ
झाला तेव्हां त्यानें व त्याजबरोबर सर्व
इस्राएलांनीं परमेश्वराचें नियमशास्त्र सोडून दिलें.
२ त्याच्या कारकीर्दीच्या पांचव्या वर्षी मिसर देशाचा राजा
शिशक यरुशलेमावर चाल करून आला; कारण त्यांनीं
परमेश्वराचा अपराध केला. ३ बाराशें रथ व साठ हजार
स्वार घेऊन त्यानें यरुशलेमावर स्वारी केली; मिसरांतून

त्याजबरोबर लुबी, सुकी व कूशी हे लोक आले ते
असंख्य होते. ४ यहूदाचीं तटबंदी नगरें घेत घेत तो
यरुशलेमापर्यंत आला. ५ तेव्हां रहबाम व यहूदाचे
सरदार शिशकाच्या भीतीनें यरुशलेमांत एकत्र मिळाले
असतां त्यांजकडे शमाया संदेष्टा येऊन म्हणाला, परमेश्वर
म्हणतो, तुम्हीं मला सोडिलें म्हणून मींहि तुम्हांला
सोडून तुम्हांस शिशकाच्या हातीं दिलें आहे. ६ तेव्हां
इस्राएलाचे सरदार व राजा हे दीन झाले व म्हणूं लागले
कीं परमेश्वर न्यायी आहे. ७ ते दीन झाले आहेत असें
परमेश्वरानें पाहिलें तेव्हां परमेश्वराचें वचन शमायास
प्राप्त झालें कीं ते दीन झाले आहेत यास्तव मी त्यांचा
नाश करणार नाहीं; मी लवकरच त्यांचा बचाव
करीन; माझ्या क्रोधाचा वर्षाव शिशकाच्या हस्तें मी
यरुशलेमावर करणार नाहीं. ८ माझी सेवा व
इतर देशांतील राजांची सेवा यांतील भेद त्यांस
कळावा म्हणून ते त्याचे अंकित होतील. ९ मिसर
देशाचा राजा शिशक यानें यरुशलेमावर स्वारी
केली; त्यानें परमेश्वराच्या मंदिरांतील व राजवाड्यांतील
सर्व भांडार लुटून नेलें; शलमोन राजानें ज्या सोन्याच्या
ढाली केल्या होत्या त्याहि त्यानें नेल्या. १० रहबाम
राजानें त्यांच्याऐवजीं पितळेच्या ढाली बनविल्या आणि
राजाच्या स्वारीपुढें धावणारे जे राजवाड्याची रखवाली
करीत असत त्यांच्या स्वाधीन त्या केल्या. ११ राजा
परमेश्वराच्या मंदिरांत जात असे तेव्हां हे धावणारे
त्या ढाली घेऊन पुढें चालत आणि मग त्या आपल्या
चौकींत आणून ठेवीत. १२ रहबाम दीन झाला तेव्हां
परमेश्वराचा त्याजवरचा कोप शमला; त्यानें त्याचा
पुरा नाश केला नाहीं; शिवाय यहूदाच्या ठायीं कांहीं
चांगल्या गोष्टी अद्यापि राहिल्या होत्या. १३ या प्रकारें
रहबाम राजानें यरुशलेमांत आपली मजबुती करून
तेथें राज्य केलें; रहबाम राज्य करूं लागला तेव्हां
तो एकेचाळीस वर्षांचा होता, व परमेश्वरानें आपल्या
नामाच्या निवासासाठीं म्हणून जें यरुशलेम नगर
सर्व इस्राएल वंशांतून निवडून घेतलें होतें तेथें त्यानें
सतरा वर्षें राज्य केलें; त्याच्या आईचें नांव नामा;
ती अमोनीण होती. १४ जें वाईट तें त्यानें केलें,
कारण परमेश्वराच्या भजनीं त्यानें चित्त लाविलें नाहीं.
१५ रहबामाचीं अथपासून इतिपर्यंत कृत्यें शमाया
संदेष्टा व इद्दो द्रष्टा यांच्या बखरींत वंशावळ्यांच्या क्रमा-
नुसार लिहिलेलीं आहेत, नाहींत काय? रहबाम व
यराबाम यांच्या नेहमीं लढाया चालू असत. १६ रह-
बाम आपल्या पितरांजवळ जाऊन निजला; त्यास
दावीदपुरांत मूठमाती दिली; त्याच्या जागीं त्याचा
पुत्र अबीया राजा झाला.

१ यराबामाच्या कारकीर्दीच्या अठराव्या वर्षी
१३ अबीया यहूदावर राज्य करूं लागला. २ यानें
यरुशलेमांत तीन वर्षें राज्य केलें; त्याच्या आईचें
नांव मीखाया; ही गिबा येथील उरीएल याची कन्या.
अबीया व यराबाम यांची लढाई झाली. ३ अबीया
मोठमोठ्या लढवय्यांचें चार लक्ष सैन्य घेऊन लढाईस
उभा राहिला; इकडे यराबाम मोठे शूर वीर असे
निवडक आठ लक्ष पुरुष घेऊन त्याच्याशीं सामना
करावयाचा व्यूह रचून सिद्ध झाला. ४ अबीया
एफ्राइमाच्या डोंगरवटींतल्या समाराइम पहाडावर उभा
राहून बोलला, हे यराबामा, अहो सर्व इस्राएलांनो,
माझें ऐका; ५ इस्राएलाचा देव परमेश्वर यानें
दाविदाला व त्याच्या वंशजांना इस्राएलाचें राज्य मिठाचा
करार करून सर्वकाळचें दिलें आहे, हें तुम्हांस कळूं नये
काय? ६ दावीदपुत्र शलमोन याचा सेवक नबाटपुत्र
यराबाम यानें आपल्या स्वामीवर उठून बंडावा केला
आहे. ७ त्याच्यापाशीं हलके व अधम लोक जमले
आहेत आणि शलमोनाचा पुत्र रहबाम तरुण व अल्लड
असून त्यांच्याशीं सामना करण्यास समर्थ नाहीं म्हणून
त्यांनीं त्याजशीं लढण्यास कमर बांधिली आहे.
८ आतां दाविदवंशजांच्या हातीं असलेलें परमेश्वराचें
जें राज्य त्याशीं तुम्ही विरोध करण्याचा विचार मांडिला
आहे; तुम्ही एकवट होऊन तुमचा एक मोठा समुदाय
झाला आहे आणि यराबामानें जीं सोन्याचीं वासरें
तुमचे देव व्हावे म्हणून बनविलीं तीं तुमच्याजवळ
आहेत. ९ तुम्हीं परमेश्वराचे याजक जे अहरोनाचे

वंशज आणि लेवी त्यांस घालवून देऊन इतर राष्ट्रांच्या
लोकांप्रमाणें आपले याजक केले आहेत, हें खरें ना?
कोणी एकाद्यानें गोऱ्हा व सात एडके आणून स्वतांस
संस्कार केला कीं जे देव नव्हत त्यांचा तो याजक
बनतो. १० आमच्या लोकांचा देव परमेश्वर आहे,
आम्हीं त्यास सोडिलें नाहीं; आणि परमेश्वराची सेवा-
चाकरी करणारे जे याजक आमच्यापाशीं आहेत ते
अहरोनाचे वंशज आहेत आणि लेवीहि आपआपलीं
कामें करीत आहेत. ११ ते नित्य सकाळीं व संध्या-
काळीं परमेश्वरप्रीत्यर्थ होमबलि व सुगंधी धूप जाळि-
तात; ते शुद्ध मानलेल्या मेजावर समर्पित भाकर मांडि-
तात; सोन्याचा दीपवृक्ष व त्यावरचे दिवे दररोज संध्या-
काळीं ते उजळतात; आम्ही आपला देव परमेश्वर याची
आज्ञा पाळीत असतों, पण तुम्हीं त्याला सोडिलें आहे.
१२ पाहा, आमच्याबरोबर, आमच्यापुढें देव
आहे; तुमच्याविरुद्ध लोकांस इशारा देण्यासाठीं त्याचे
याजक करणे हातीं घेऊन असतात. इस्राएल लोकहो,
तुम्ही आपल्या पूर्वजांचा देव परमेश्वर याजशीं लढूं
नका; तुम्हांस यश यावयाचें नाहीं. १३ तरी पण
यराबामानें दबा धरणाऱ्यांस वळसा घालावयास सांगून
शत्रूंच्या पिछाडीस पाठविलें; या प्रकारें यहूदाच्या
अघाडीस ते होते व पिछाडीस दबा धरणारे होते.
१४ यहूदी लोकांनीं मागें वळून पाहिलें तों आपल्या
पुढें व मागें युद्ध होणार असें त्यांस दिसून आलें,
तेव्हां त्यांनीं परमेश्वराचा धावा केला आणि याजक
करणे वाजवूं लागले. १५ यहूदी लोकांनीं जयघोष
केला; ते जयजयकार करीत असतां देवानें अबीया
व यहूदा यांच्यासमोर यराबाम व सर्व इस्राएल
यांचा मोड केला. १६ इस्राएल लोक यहूदासमोरून
पळाले आणि देवानें त्यांस त्यांच्या हातीं दिलें.
१७ अबीया व त्याचे लोक यांनीं त्यांची मोठी कत्तल
उडविली; त्या दिवशीं इस्राएलांतल्या पांच लक्ष निव-
डक पुरुषांचा संहार झाला. १८ या प्रकारें इस्राएल
लोक त्या प्रसंगीं चीत झाले, आणि यहूदी लोक प्रबल
झाले, कारण त्यांनीं आपल्या पूर्वजांचा देव परमेश्वर
याजवर भिस्त ठेविली होती. १९ अबीयानें यराबामाचा
पाठलाग करून बेथेल, यशाना व एफ्रान हीं नगरें
त्यांच्या आसपासच्या गांवांसहित काबीज केलीं.
२० अबीयाच्या कारकीर्दीत यराबाम पुनः कांहीं साव-
रला नाहीं; परमेश्वरानें त्यास ताडन केल्यामुळें तो
मृत्यु पावला. २१ अबीया प्रबळ झाला; त्यानें चौदा
बायका केल्या आणि त्यास बावीस पुत्र व सोळा
कन्या झाल्या. २२ अबीयाचीं वरकड कृत्यें, त्याची
चालचलणूक व त्याचीं वचनें हीं संदेष्टा इद्दो याच्या
बखरीच्या पुस्तकांत लिहिलेलीं आहेत.

१४ १ अबीया हा आपल्या पितरांजवळ जाऊन
निजला, त्यांनीं त्यास दावीदपुरांत पुरिलें आणि
त्याचा पुत्र आसा हा त्याच्या जागीं राजा झाला.
त्याच्या कारकीर्दीत देशांत दहा वर्षे स्वास्थ्य होतें.
२ आसानें आपला देव परमेश्वर याच्या दृष्टीनें जें
चांगलें व नीट तें केलें; ३ त्यानें अन्य देवांच्या वेद्या
व उच्च स्थानें काढून टाकिलीं, मूर्तिस्तंभ मोडिले व
अशेरा मूर्ति भंगिल्या; ४ यहूदी लोकांनीं आपल्या
पूर्वजांचा देव परमेश्वर याच्या चरणीं लागावें आणि
नियमशास्त्र व आज्ञा यांचें पालन करावें अशी त्यानें
त्यांस आज्ञा केली. ५ त्यानें यहूदाच्या सर्व नगरांतून
उच्च स्थानें व सूर्याच्या मूर्ति काढून टाकिल्या आणि
राज्यांत स्वस्थता केली. ६ त्यानें यहूदांत तटबंदीचीं नगरें
बांधिलीं. देशांत स्वास्थ्य होतें आणि त्या काळीं
कांहीं लढाई झाली नाहीं, कारण परमेश्वरानें त्यांस
आराम दिला होता. ७ तो यहूदी लोकांस म्हणाला,
चला, आपण हीं नगरें बसवूं आणि त्यांस
सभोवार कोट, बुरुज, वेशी आणि अडसर करूं; देश
आपल्या हातीं आहे, कारण आपण आपला देव
परमेश्वर याची कास धरिली आहे; आपण त्याची
कास धरिली आहे व त्यानें आपल्याला चोहोंकडून
स्वास्थ्य दिलें आहे. ह्याप्रमाणें लोक नगरें वसवून
समृद्ध झाले. ८ आसाच्या पदरीं ढाली व भाले धारण
करणाऱ्यांची एक सेना होती. यहूदांतले तीन लक्ष
पुरुष होते, बन्यामिनांतले ढाली धारण करणारे व

तिरंदाज दोन लक्ष ऐशीं हजार पुरुष होते; हे सर्व शूर
योद्धे होते. ९ नंतर दहा लक्ष पुरुषांची सेना व तीनशें
रथ घेऊन जेरह नांवाचा एक कूशी त्यांजवर चाल
करून आला; तो मारेशापर्यंत आला. १० आसा
त्याच्याशीं सामना करण्यास गेला तेव्हां मारेशा येथें
सफाथा नांवाच्या खोऱ्यांत लढाईस तोंड लागलें.
११ या प्रसंगीं आसानें आपला देव परमेश्वर याची
प्रार्थना केली कीं हे परमेश्वरा, सबलांच्या विरुद्ध
निर्बलांचें साहाय्य करणारा तुजवांचून अन्य कोणी
नाहीं; हे आमच्या देवा, परमेश्वरा, आमचें साहाय्य
कर; आमची भिस्त तुजवर आहे; आम्ही तुझ्या
नामावर भरंवसा ठेवून या समूहाशीं सामना करण्यास
आलों आहों. हे परमेश्वरा, तूं आमचा देव आहेस;
मानवांचें तुजवर वर्चस्व होऊं देऊं नको. १२ तेव्हां
परमेश्वरानें आसा व यहूदी यांच्यापुढें कूशी लोकांस
असा मार दिला कीं ते पळून गेले. १३ आसा व
त्याजबरोबरचे लोक यांनीं त्यांचा पाठलाग गरारा-
पर्यंत केला; त्या प्रसंगीं इतके कूशी पडले कीं त्यांनीं
पुनः आपलें डोकें वर केलें नाहीं; त्याच्या सेनेपुढें
त्यांची गाळण उडाली व यहूदी लोकांनीं पुष्कळ लूट
नेली. १४ त्यांनीं गराराच्या आसपासच्या त्या सर्व
नगरांस मार दिला; कां कीं परमेश्वराची दहशत त्या सर्व
नगरांस पोहंचली होती; त्यांनीं तीं नगरें लुटिलीं, कारण
त्यांत बहुत धन होतें. १५ मग त्यांनीं गुरांढोरांचीं
वाडगीं मोडून पुष्कळ शेरडेंमेंढरें व उंट लुटून नेले,
आणि ते यरुशलेमास परत गेले.

१५ १ मग देवाच्या आत्म्यानें ओदेदाचा पुत्र
अजऱ्या यास स्फूर्ति दिली; २ तो आसाच्या
भेटीस जाऊन त्यास म्हणाला, हे आसा, अहो
यहूदी व बन्यामिनी लोकहो, मी म्हणतों तें श्रवण करा;
तुम्ही परमेश्वराच्याबरोबर राहाल तोंवर तो तुमच्या-
बरोबर राहील; तुम्ही त्यास शरण जाल तर तो तुम्हांस
पावेल, पण तुम्ही त्यास सोडाल तर तो तुम्हांस सोडील.
३ बहुत काळपर्यंत इस्राएलांस खऱ्या देवाची ओळख
नव्हती, त्यांस शिकवावयास कोणी याजक किंवा नियम-
शास्त्र नव्हतें; ४ पण ते आपल्या संकटावस्थेंत
इस्राएलाचा देव परमेश्वर याजकडे वळून त्याला शरण
गेले, तेव्हां तो त्यांस पावला. ५ त्या काळीं बाहेर
जाणारे व आंत येणारे यांपैकीं कोणासहि शांति नसे;
देशाच्या सर्व रहिवाश्यांस फारच संकटें प्राप्त होत
असत. ६ राष्ट्रावर राष्ट्र उलटून व नगरावर नगर
उलटून त्या सर्वांचा चुराडा होत असे, कारण देव
नाना प्रकारचे कष्ट देऊन त्यांस त्रस्त करीत असे;
७ पण तुम्ही हिंमत धरा, तुमचे हात गळूं देऊं नका,
कारण तुमच्या कर्तृत्वाचें तुम्हांस फळ मिळेल. ८ आसानें
हीं वचनें व ओदेद संदेष्ट्याचा संदेश ऐकला, तेव्हां
त्यास धीर आला व त्यानें यहूदा व बन्यामीन यांच्या
सर्व प्रदेशांतून आणि एफ्राइमाच्या डोंगरवटींतील जीं
नगरें त्यानें घेतलीं होतीं त्यांतून सर्व अमंगळ वस्तु काढून
टाकिल्या आणि परमेश्वराची जी वेदी परमेश्वराच्या
देवडीपुढें होती तिचा जीर्णोद्धार केला. ९ त्यानें
सर्व यहूदी व बन्यामिनी लोकांस व त्यांजबरोबर
राहणाऱ्या एफ्राइम, मनश्शे व शिमोन या प्रांतांतल्या
लोकांस एकवट केलें; त्याचा देव परमेश्वर त्याच्याबरोबर
आहे असें लोकांनीं पाहिलें तेव्हां इस्राएलांतले पुष्कळ
लोक त्याच्या बाजूचे झाले. १० आसाच्या कारकीर्दीच्या
पंधराव्या वर्षाच्या तिसऱ्या महिन्यांत ते यरुशलेमांत
एकवट झाले. ११ त्यांनीं, आणिलेल्या लुटींतून, सातशें
बैल व सात हजार शेरडेंमेंढरें त्या दिवशीं परमे-
श्वरास अर्पिलीं. १२ त्यांनीं असा करार केला कीं
आम्ही जिवेंभावें आपल्या पूर्वजांचा देव परमेश्वर
यास शरण जाऊं; १३ लहान असो कीं थोर असो,
स्त्री असो कीं पुरुष असो, जो कोणी इस्राएलाचा देव
परमेश्वर यास शरण जाणार नाहीं त्याचा वध व्हावा.
१४ त्यांनीं जयघोष करून आणि करणे व रणशिंगें
वाजवून उच्च स्वरानें परमेश्वरासमक्ष शपथ वाहिली.
१५ सर्व यहूदी लोक आणभाक करून हर्षभरित झाले;
त्यांनीं मनःपूर्वक शपथ वाहिली, ते मोठ्या उत्कंठेनें
त्यास शरण गेले आणि तो त्यांस पावला; परमे-
श्वरानें त्यांस चोहोंकडून स्वास्थ्य दिलें. १६ आसा

राजानें आपली आई माका हिला राजमातेच्या
पदावरून दूर केलें, कारण तिनें अशेराप्रीत्यर्थ एक
अमंगळ मूर्ति केली होती; तिनें केलेली ती मूर्ति आसानें
फोडूनतोडून किद्रोन ओहळाजवळ जाळून टाकिली.
१७ त्यानें उच्च स्थानें इस्राएलांतून काढून टाकिलीं
नाहींत; तथापि आसाचें हृदय साऱ्या हयातींत सात्त्विक
राहिलें. १८ त्याच्या बापानें व त्यानें स्वतः सोनें,
चांदी व पात्रें परमेश्वरास वाहिलीं होतीं तीं सर्व त्यानें
देवाच्या मंदिरांत नेऊन ठेविलीं. १९ आसा
राजाच्या कारकीर्दीच्या पस्तिसाव्या वर्षापर्यंत पुनः युद्ध
झालें नाहीं.

**१६** १ आसाच्या कारकीर्दीच्या छत्तिसाव्या वर्षी
इस्राएलाचा राजा बाशा यानें यहूदावर स्वारी
केली; यहूदाचा राजा आसा याच्याकडे
कोणालाहि येण्याजाण्याला प्रतिबंध व्हावा म्हणून
इस्राएलाचा राजा बाशा यानें रामा नगराची मजबुती
केली. २ परमेश्वराच्या मंदिराच्या व राजवाड्याच्या
भांडारांतलें सोनें व चांदी काढून आसानें दिमिष्क-
वासी अरामाचा राजा बेन-हदाद याजकडे पाठविलीं;
आणि त्याला असें सांगून पाठविलें कीं ३ माझ्या बापाचा
व आपल्या बापाचा सलोखा होता तसा आपला व माझा
सलोखा होवो; तर पाहा, मीं आपणाला सोनें व चांदी पाठ-
विली आहे. इस्राएल राजा बाशा याच्याशीं केलेला करार
मोडून टाका म्हणजे तो माझ्यामागें लागण्याचें सोडून
देईल. ४ आसा राजाचें हें बोलणें मान्य करून बेन-
हदादानें आपल्या सैन्याच्या सरदारांस इस्राएली नगरां-
वर स्वारी करावयास पाठविलें; त्यांनीं ईयोन, दान,
आबेल-मईम व नफतालीचीं सर्व भांडारनगरें जिंकिलीं.
५ हें ऐकून रामा शहराची मजबुती करण्याचें सोडून
बाशानें तें काम तसेंच टाकिलें. ६ आसा राजानें सर्व यहूदी
लोकांस बोलावून आणिलें व जे दगड व जीं लाकडें घेऊन
बाशा रामा नगराची तटबंदी करीत होता तीं त्यानें काढून
नेलीं आणि गेबा व मिस्पा हीं नगरें बांधण्याच्या कामीं
लाविलीं. ७ त्या प्रसंगीं हनानी द्रष्टा यहूदाच्या राजा आसा
याजकडे येऊन म्हणाला, तूं आपला देव परमेश्वर याजवर
भरंवसा ठेविला नाहीं व अरामाच्या राजावर भरंवसा
ठेविला म्हणून अरामाच्या राजाचें सैन्य तुझ्या हातून
सुटून गेलें आहे. ८ कुशी व लुबी यांचें मोठें सैन्य
नव्हतें काय? त्यांच्यापाशीं बहुत रथ व राऊत नव्हते
काय? तरी त्या प्रसंगीं तूं परमेश्वरावर भिस्त ठेविली
म्हणून त्यानें त्यांस तुझ्या हातीं दिलें. ९ परमेश्वराचे
नेत्र अखिल पृथ्वीचें निरीक्षण करीत असतात, जे कोणी
सात्त्विक चित्तानें त्याच्याशीं वर्ततात त्यांचें साहाय्य
करण्यांत तो आपलें सामर्थ्य प्रगट करितो. हा तूं मूर्ख-
पणा केला म्हणून यापुढें तुझ्यामागें लढाया लागणार.
१० हें ऐकून आसा त्या द्रष्ट्यावर रागावला, व त्यानें त्यास
अटकेंत ठेविलें; कारण त्यामुळें तो त्याजवर फार कोपा-
यमान झाला होता. याच सुमारास आसानें कांहीं लोकां-
वर जुलूम चालविला. ११ आसाचीं आद्य-
पासून इतिपर्यंतचीं सगळीं कृत्यें यहूदा व इस्राएल यांच्या
राजांच्या बखरींत लिहिलेलीं आहेत. १२ आसाच्या
पायास त्याच्या कारकीर्दीच्या एकुणचाळिसाव्या वर्षी
व्याधि झाला; तो व्याधि बराच वाढला; तथापि त्या
रोगांत तो परमेश्वरास शरण न जातां वैद्यांस शरण
गेला. १३ मग आसा आपल्या पितरांजवळ जाऊन
निजला; तो आपल्या कारकीर्दीच्या एकेचाळिसाव्या वर्षी
मृत्यु पावला. १४ दावीदपुरांत जें थडगें त्यानें खोदविलें
होतें त्यांत त्यास मूठमाती दिली आणि सुवासिक द्रव्यें
आणि गांध्यांनीं केलेले तऱ्हेतऱ्हेचे मसाले यांनीं भर-
लेल्या बिछान्यावर त्यास त्यांनीं निजविलें व त्याच्या-
प्रीत्यर्थ त्यांनीं बहुत सुवासिक द्रव्यें जाळिलीं.

**१७** १ त्याचा पुत्र यहोशाफाट त्याच्या जागीं
राजा झाला; इस्राएलाशीं सामना करितां यावा
म्हणून त्यानें आपली मजबुती केली. २ त्यानें
यहूदाच्या सर्व तटबंदी नगरांतून लष्कर ठेविलें; यहूदा
देशांत आणि एफ्राइमांतील जीं नगरें त्याचा बाप आसा
यानें हस्तगत केलीं त्यांत त्यानें ठाणीं बसविलीं. ३ यहो-
शाफाट आपला पूर्वज दावीद प्रथमारंभीं जसा
वर्तला तसा वर्तला; तो बालमूर्तीच्या नादीं लागला
नाहीं, म्हणून परमेश्वर त्याच्याबरोबर असे; ४ तो

आपल्या बापाच्या देवास शरण गेला व त्याच्या
आज्ञांप्रमाणें वागला; इस्राएलांच्या कृतींप्रमाणें तो
वर्तला नाहीं. ५ यास्तव परमेश्वरानें त्याच्या हातांनीं
राज्याची मजबुती केली; सर्व यहूदी लोक त्यास भेटी
आणीत; तो धन व मान यांहींकरून संपन्न झाला.
६ परमेश्वराच्या मार्गांनीं चालण्यांत त्याच्या मनास
उत्साह वाटे; त्यानें यहूदांतून उच्च स्थानें व अशेरा मूर्ति
काढून टाकिल्या. ७ त्यानें आपल्या कारकीर्दीच्या
तिसऱ्या वर्षी आपले सरदार बेन-हईल, ओबद्या,
जखऱ्या, नथनेल व मीखाया यांस यहूदाच्या नगरांस
शिस्त लावण्यासाठीं पाठविलें; ८ त्यांच्याबरोबर शमाया,
नथन्या, जबद्या, असाएल, शमीरामोथ, यहोनाथान,
अदोनीया, तोबीया, तोब-अदोनीया हे लेवी आणि
अलीशामा व यहोराम हे याजक त्यानें पाठविले.
९ त्यांनीं आपल्याबरोबर परमेश्वराच्या नियमशास्त्राचा
ग्रंथ घेऊन यहूदाच्या नगरांत जाऊन शिक्षण दिलें;
यहूदाच्या सर्व नगरांत फिरून त्यांनीं लोकांस शिकविलें.
१० यहूदाच्या आसपासच्या सर्व देशांच्या राजांस
परमेश्वराचा असा धाक बसला कीं त्यांनीं यहोशा-
फाटाशीं युद्ध केलें नाहीं. ११ कित्येक पलिष्ट्यांनीं
यहोशाफाटास भेटी व खंडणी म्हणून चांदी आणिली;
अरबी लोक सात हजार सातशें मेंढरें व सात हजार
सातशें बकरीं यांचे कळप घेऊन त्याजकडे आले;
१२ यहोशाफाट फार थोर झाला व त्यानें यहूदांत
गढ्या व भांडारनगरें बांधिलीं. १३ यहूदाच्या नगरांत
त्याचीं मोठमोठीं कामें चालत; यरुशलेमांत त्याचे
शूर वीर राहत. १४ त्यांच्या पितृकुळांप्रमाणें
त्यांची गणती ही: यहूदाच्या सहस्रपतींचा अदना
नायक असून त्याजबरोबर तीन लक्ष शूर वीर होते;
१५ त्याच्या खालोखाल यहोहानान नायक असून
त्याच्याबरोबर दोन लक्ष ऐंशीं हजार पुरुष होते;
१६ त्याच्या खालोखाल जिख्रीचा पुत्र अमस्या हा
असून त्यानें आपल्या खुशीनें आपणास परमेश्वरास
वाहून घेतलें होतें; त्याच्याबरोबर दोन लक्ष शूर वीर
होते; १७ बन्यामिन्यांपैकीं एल्यादा हा एक महान्
योद्धा असून त्याजबरोबर धनुर्धारी व ढालवाले दोन
लक्ष लोक होते; १८ त्याच्या खालोखाल यहोजाबाद
हा असून त्याजबरोबर युद्धास तयार असे एक लक्ष
ऐंशीं हजार पुरुष होते; १९ हे सर्व राजाच्या
तैनातीस असत; राजानें यहूदाच्या सर्व तटबंदी
नगरांतून लष्कर ठेविलें होतें तें वेगळेंच.

१८
१ यहोशाफाट धन व मान यांनीं संपन्न
होता; त्यानें अहाबाशीं शरीरसंबंध केला.
२ कांहीं वर्षे लोटल्यावर तो शोमरोन येथें
अहाबाच्या भेटीस गेला. त्या प्रसंगीं अहाबानें त्याच्या-
साठीं व त्याजबरोबरच्या लोकांसाठीं पुष्कळ मेंढरें व
बैल कापिले आणि आपल्याबरोबर रामोथ-गिलादावर
चढाई करण्यास त्यानें त्याला प्रवृत्त केलें. ३ यहूदाचा
राजा यहोशाफाट याला इस्राएलाचा राजा अहाब
म्हणाला, रामोथ-गिलाद येथें लढावयास आपण मजबरोबर
याल काय? त्यास यहोशाफाटानें उत्तर दिलें,
मी आणि आपण एकच; माझे लोक ते आपले; आम्ही
आपणाबरोबर लढाईस येऊं. ४ यहोशाफाटानें इस्राएलाच्या
राजास म्हटलें, आज परमेश्वराचा आदेश घ्या.
५ इस्राएलाच्या राजानें सुमारें चारशें संदेष्टे जमवून त्यांस
विचारिलें, आम्हीं रामोथ-गिलादावर चढाई करून जावें
कीं न जावें? त्यांनीं उत्तर दिलें, चढाई करून जावें; देव तें
राजाच्या हातीं देईल. ६ तेव्हां यहोशाफाटानें विचारिलें,
यांच्याखेरीज परमेश्वराचा दुसरा कोणी संदेष्टा नाहीं
काय? त्याला आम्ही प्रश्न विचारूं. ७ इस्राएलाचा राजा
यहोशाफाटास म्हणाला, ज्याच्या द्वारें परमेश्वराचा सल्ला
घेतां येईल असा आणखी एक मनुष्य आहे, पण मला
त्याचा तिरस्कार वाटतो; कारण मला अनुकूल असा
संदेश तो कधींहि देत नाहीं, प्रतिकूल तेवढाच देतो;
तो इम्लाचा पुत्र मीखाया होय. यहोशाफाट म्हणाला,
राजानें असें बोलूं नये. ८ तेव्हां इस्राएलाच्या राजानें
एका कारभाऱ्यास बोलावून सांगितलें, लवकर जाऊन
इम्लाचा पुत्र मीखाया यास घेऊन ये. ९ इस्राएलाचा
राजा आणि यहूदाचा राजा यहोशाफाट हे आपआपलीं
राजवस्त्रें धारण करून शोमरोनाच्या वेशीजवळ एका

उघड्या जागेंत आपआपल्या सिंहासनावर विराजमान
झाले होते, आणि सर्व संदेष्टे त्यांच्यापुढें भाषण करीत
होते. १० तेव्हां कनानाचा पुत्र सिद्कीया यानें लोखं-
डाचीं शिंगें करून आणिलीं होतीं; तो म्हणाला, परमे-
श्वर म्हणतो, या शिंगांनीं तूं अरामी लोकांस हुंदडून त्यांचा
नाश करिशील. ११ सर्व संदेष्टे त्याच्याप्रमाणेंच भाषण
करू लागून म्हणाले, रामोथ-गिलादावर चढाई करून जा,
यशस्वी हो; कारण परमेश्वर तें राजाच्या हातीं देईल.
१२ जो जासूद मीखायास बोलवावयास गेला होता तो
त्यास म्हणाला, पाहा, सर्व संदेष्टे एका विचाराचे होऊन
राजासंबंधानें शुभवचन बोलत आहेत, म्हणून त्यांच्या-
प्रमाणेंच तूंहि शुभसंदेश कथन करावा. १३ मीखाया
म्हणाला, परमेश्वराच्या जीविताची शपथ, माझा देव
जें कांहीं सांगेल तेंच मी बोलेन. १४ तो राजाकडे
आला तेव्हां राजानें त्याला विचारिलें, हे मीखाया,
आम्हीं रामोथ-गिलादाशीं युद्ध करावयास जावें कीं
न जावें? त्यानें त्यास म्हटलें, जा, यशस्वी हो; ते
तुमच्या हातीं लागतील. १५ राजा त्यास म्हणाला,
परमेश्वराच्या नामानें मला खरें तेंच सांग. असें मीं
तुला कितीदा शपथ घालून सांगावें? १६ मग तो
म्हणाला, सर्व इस्राएल मेंढपाळावांचून मेंढरांसारखे
डोंगरावरून विखरले आहेत असें मला दिसलें. तेव्हां
परमेश्वर म्हणाला, यांस कोणी धनी नाहीं, तर हे
आपापल्या घरीं सुखरूप परत जावोत. १७ इस्राएलाचा
राजा यहोशाफाटास म्हणाला, हा माझ्या-
संबंधानें अनुकूळ संदेश न सांगतां प्रतिकूळ सांगेल
असें मीं तुला सांगितलें नाहीं काय? १८ मीखाया
म्हणाला, तर आतां तुम्ही परमेश्वराचें वचन
ऐका: परमेश्वर आपल्या सिंहासनावर विराजमान
झाला आहे व त्याच्या उजवीकडे स्वर्गांतील सर्व सेना
उभी आहे असें माझ्या दृष्टीस पडलें. १९ परमेश्वर
म्हणाला, इस्राएलाचा राजा अहाब यास कोण मोह
घालील कीं तो रामोथ-गिलादावर चाल करून तेथें
पतन पावेल? तेव्हां कोणीं असें, कोणीं तसें
म्हटलें. २० त्या समयीं एक आत्मा जवळ येऊन
परमेश्वरासमोर उभा राहिला आणि म्हणाला, मी
त्याला मोह घालितों. २१ परमेश्वरानें विचारिलें, कसा?
तो म्हणाला, मी जाऊन त्याच्या सर्व संदेष्ट्यांच्या
मुखांत असत्य वदविणारा आत्मा होईन. परमेश्वर
म्हणाला, तूं त्यास मोह घालिशील; जा, तुजकडून हें
होईल; तसेंच कर. २२ तर पाहा, परमेश्वरानें तुझ्या
या संदेष्ट्यांच्या मुखांत असत्य वदविणारा आत्मा
संचरविला आहे; तुझें अनिष्ट होणार असें परमेश्वर
बोलला आहे. २३ तेव्हां कनानाचा पुत्र सिद्कीया
मीखायाजवळ गेला आणि त्याच्या तोंडांत मारून
त्यानें त्याला विचारिलें, परमेश्वराचा आत्मा मला
सोडून तुझ्याशीं बोलावयास कोठून गेला? २४ मीखाया
त्यास म्हणाला, तूं लपावयासाठीं घराच्या आंतल्या
कोठडींत पळून जाशील तेव्हां तुला कळेल. २५ मग
इस्राएलाचा राजा म्हणाला, मीखायाला नगराचा सुभेदार
आमोन व राजपुत्र योवाश यांच्याकडे माघारीं घेऊन
जा; २६ आणि त्यांना सांगा, राजा म्हणतो, या मनुष्यास
बंदींत टाका व मी सुखरूप परत येईपर्यंत त्यास
शिक्षेचें अन्न व शिक्षेचें पाणी द्या. २७ मीखाया
म्हणाला, तूं सुखरूप परत आलास तर समजावें कीं
परमेश्वर माझ्या द्वारें बोललाच नाहीं. तो म्हणाला,
लोकहो, तुम्ही सर्व हें ऐका.

२८ नंतर इस्राएलाचा राजा व यहूदाचा राजा
यहोशाफाट यांनीं रामोथ-गिलादावर चढाई केली.
२९ इस्राएलाच्या राजानें यहोशाफाटास सांगितलें, मी
वेष बदलून लढाईस जाणार; पण तूं आपलीं स्वतांचीं
वस्त्रें घाल. याप्रमाणें इस्राएलाचा राजा वेष बदलून
लढाईस गेला. ३० अरामाच्या राजानें रथावरील
आपल्या सरदारांस आज्ञा केली होती कीं लहानथोरां-
पैकीं कोणाशींहि लढूं नका, इस्राएलाच्या राजाशीं मात्र
लढा. ३१ रथावरील त्या सरदारांनीं यहोशाफाटास
पाहिलें तेव्हां त्यांस वाटलें कीं हाच इस्राएलाचा राजा
असावा; म्हणून त्यांनीं त्याच्याशीं लढावयासाठीं मोर्चा
फिरविला; पण यहोशाफाटानें आरोळी ठोकिली तेव्हां
परमेश्वरानें त्याला साहाय्य केलें, आणि देवानें त्यांना

त्याजकडून निघून जाण्यास प्रवृत्त केलें. ३२ रथांवरील
सरदारांनीं हा इस्राएलाचा राजा नाहीं असें पाहिलें
तेव्हां त्याचा पिच्छा सोडून ते परतले. ३३ मग
कोणीएकानें सहजगत्या एक बाण सोडिला, तो जाऊन
इस्राएली राजाच्या चिलखताच्या सांध्यांत रुतला;
तेव्हां तो आपल्या सारथ्यास म्हणाला, मी घायाळ
झालों आहें, रथ फिरवून मला सैन्याबाहेर घेऊन जा.
३४ त्या दिवशीं घनघोर युद्ध झालें; अराम्यांच्या
मारापुढें राजा आपल्या रथाला टेकून संध्याकाळपर्यंत
राहिला होता; सूर्यास्तसमयीं त्याचा प्राण गेला.

१९ १ यहूदाचा राजा यहोशाफाट सुखरूपपणें
आपल्या घरीं यरुशलेमास परत गेला. २ तेव्हां
हनानी द्रष्टयाचा पुत्र येहू हा यहोशाफाट राजास
सामोरा जाऊन म्हणाला, तूं दुष्टांचें साहाय्य करावें
व परमेश्वराच्या द्वेष्ट्यांवर प्रीति करावी काय? यामुळें
परमेश्वराचा तुजवर कोप भडकला आहे. ३ तथापि
तुझ्या ठायीं कांहीं चांगल्या गोष्टी दिसून आल्या
आहेत; तूं देशांतून अशेरा मूर्तींचा नाश केला आहे व
आपलें मन देवाच्या भजनीं लाविलें आहे.

४ यहोशाफाट यरुशलेमास राहत असे; त्यानें
बैर-शेब्यापासून एफ्राइमाच्या डोंगरप्रदेशापर्यंत पुन:
आपल्या लोकांमध्यें फिरून त्यांस त्यांच्या पूर्वजांचा
देव परमेश्वर याजकडे परत आणिलें. ५ त्यानें
यहूदाच्या प्रत्येक तटबंदी नगरांत शास्ते नेमिले;
६ त्यानें त्या शास्त्यांस सांगितलें, तुम्ही काय करितां
याचा विचार करा; तुम्ही न्याय कराल तो मानवा-
साठीं नाहीं तर परमेश्वरासाठीं करावयाचा आहे;
न्याय करितांना तो तुमच्याबरोबर असणार. ७ तर
परमेश्वराची भीति तुमच्या ठायीं असूं द्या; तुम्ही जें
कांहीं कराल तें संभाळून करा; कारण आपला देव
परमेश्वर याच्याकडे कांहीं अधर्म नाहीं; तो कोणाचें
तोंड पाहून न्याय करीत नाहीं कीं लांच घेत नाहीं.
८ यरुशलेमांतहि यहोशाफाटानें लेवी व याजक
आणि इस्राएलाच्या पितृकुळांचे प्रमुख यांस परमे-
श्वराच्या बाबतींत न्याय करावयास व वादाचा निकाल
करावयास नेमिलें. मग ते यरुशलेमांत परत आले.
९ त्यानें त्यांस बजावून सांगितलें कीं परमेश्वराचें भय
बाळगून खऱ्या व निष्कपट मनानें असें करा.
१० तुमचे भाऊबंद जे आपआपल्या नगरांत राहत
आहेत, त्यांच्यापैकीं कोणाचा वाद तुमच्यापुढें आला
तर, तो मग खुनाचा असो; किंवा धर्मशास्त्र, आज्ञा,
नियम व निर्णय यांच्यासंबंधाचा असो; तुम्ही त्यांस असें
बजावून सांगा कीं तुम्ही परमेश्वराचा अपराध करूं
नका; केला तर तुम्हांवर व तुमच्या बांधवांवर त्याचा
कोप होईल; असें करा म्हणजे तुम्हांस दोष लागा-
वयाचा नाहीं. ११ पाहा, परमेश्वराविषयींच्या सर्व
प्रकरणांत मुख्य याजक अमऱ्या यास तुम्हांवर नेमिलें
आहे, आणि राजासंबंधाच्या सर्व प्रकरणांत यहूदा
वंशाचा सरदार जबद्या बिन इश्माएल यास तुम्हांवर
नेमिलें आहे; आणि लेवी हेहि तुमच्या दिमतीस
असतील. हिंमत धरा, आपलें कर्तव्य करा, परमेश्वर
भल्यांच्याबरोबर असणार.

२० १ यानंतर मवाबी व अम्मोनी आणि त्यांच्या-
बरोबर मऊन्यांतले[1] कित्येक लोक युद्ध करा-
वयास यहोशाफाटावर चालून आले. २ कांहीं
लोकांनीं येऊन यहोशाफाटास खबर दिली कीं समुद्रा-
पलीकडून अराम देशाच्या दिशेनें एक मोठा समूह तुज-
वर चाल करून येत आहे; तो जमाव हससोन-तामार
ऊर्फ एन-गेदी येथवर आला आहे. ३ यहोशाफाटास
धाक पडला व तो परमेश्वराला शरण जाण्याच्या
मार्गास लागला; सर्व यहूदानें उपास करावा असें त्यानें
फर्माविलें. ४ यहूदी लोक परमेश्वराचें साहाय्य मागण्या-
साठीं एकवट झाले; यहूदाच्या सर्व नगरांतून ते
परमेश्वराचा धावा करण्यास आले. ५ यहोशाफाट
परमेश्वराच्या मंदिरांत नव्या अंगणासमोर यहूदी व
यरुशलेमकर यांच्या जमावामध्यें उभा राहिला.
६ तो म्हणाला, हे आमच्या पूर्वजांच्या देवा, परमे-
श्वरा, तूं स्वर्गींचा देव आहेस ना? राष्ट्रांच्या सर्व
राज्यांवर तूंच शास्ता आहेस ना? तुझ्या हातीं एवढें

[1] पाठभेद: अम्मोन्यांतले; पण २६:७ पाहा.

सामर्थ्य व पराक्रम आहे कीं कोणाच्यानें तुजसमोर
टिकाव धरवत नाहीं. ७ हे आमच्या देवा, तूं या
देशाच्या रहिवाश्यांस आपल्या इस्राएल प्रजेपुढून घाल-
वून देऊन हा देश तुझा मित्र अब्राहाम याच्या
वंशजांस कायमचा दिला आहे ना? ८ ते येथें वसले
आहेत आणि येथें तुझ्या नामाप्रीत्यर्थ त्यांनीं हें पवित्र-
स्थान बांधिलें आहे. ते म्हणाले आहेत कीं ९ तरवार, दैवी
क्षोभ, मरी, अथवा दुष्काळ आम्हांवर आला तर या
मंदिरास तुझें नाम दिलें आहे त्याच्यासमोर व तुझ्यासमोर
आम्ही उभे राहून आमच्या संकटसमयीं तुझा धावा
करूं, तेव्हां तूं आमचें ऐकून आमचा बचाव करिशील.
१० पाहा, हे अम्मोनी, मवाबी व सेईर पहाडांतले
लोक; इस्राएल लोक मिसर देशाहून येत असतां त्यांना
तूं ह्यांवर स्वारी करूं दिली नाहीं; ते ह्यांच्याजवळून
वळून निघून गेले, व ह्यांचा त्यांनीं नाश केला नाहीं.
११ पाहा, जें वतन तूं आम्हांस दिलें आहे त्यांतून
आम्हांस घालवून देण्यासाठीं हे आले आहेत; असें हें
आमची उलटफेड करण्यास आले आहेत; १२ हे
आमच्या देवा, तूं त्यांचें शासन करणार नाहींस का?
कारण आमच्यावर चालून आलेल्या या मोठ्या समूहाशीं
सामना करण्यास आम्हांस ताकद नाहीं; आम्हीं काय
करावें तें आम्हांस सुचत नाहीं; पण आमचे डोळे तुज-
कडे लागले आहेत. १३ तेव्हां सर्व यहूदी आपलीं
मुलेंबाळें व स्त्रिया यांसह परमेश्वरासन्मुख उभे राहिले.
१४ मग आसाफ वंशातला यहजीएल बिन जखऱ्या
बिन बनाया बिन यईएल बिन मत्तन्या लेवी हा त्या
मंडळीमध्यें उभा होता; त्याच्या ठायीं परमेश्वराचा
आत्मा उतरला; १५ आणि तो म्हणाला, अहो सर्व
यहूद्यांनो, यरुशलेमनिवासी जनहो, आणि हे राजा यहो-
शाफाटा, तुम्ही सगळे ऐका; परमेश्वर तुम्हांस सांगत आहे
कीं हा मोठा समुदाय पाहून घाबरूं नका, कचरूं नका;
कारण युद्ध तुमचें नव्हे, देवाचें आहे. १६ उद्यां
त्यांच्याशीं सामना करावयास जा; पाहा, ते सीसघाट चढून
येत आहेत, यरूएल रानापुढें जेथें खोरें संपतें तेथें
तुम्ही त्यांस गांठाल; १७ या लढाईत तुम्हांस लढावें
लागणार नाहीं; हे यहूदा, हे यरुशलेमा, तुम्ही स्थिर उभे
राहा आणि परमेश्वर तुमचें कसें तारण करील तें पाहा;
घाबरूं नका, कचरूं नका; उद्यां त्यांजवर चाल करून
जा, कारण परमेश्वर तुमच्याबरोबर आहे. १८ मग
यहोशाफाटानें भूमीकडे तोंड करून मस्तक लवविलें,
त्याप्रमाणेंच सर्व यहूदी व यरुशलेमनिवासी यांनीं
परमेश्वराचें भजन करून त्याच्यापुढें दंडवत घातलें;
१९ आणि कहाथी व कोरही यांच्यांतले कांहीं लेवी उभे
राहून इस्राएलाचा देव परमेश्वर याचें स्तवन उच्च स्वरें
करूं लागले. २० ते अगदीं पहाटेस उठून तकोवाच्या
अरण्यांत जाण्यास निघाले; ते जाऊं लागले तेव्हां
यहोशाफाट उभा राहून म्हणाला, अहो यहूद्यांनो, अहो
यरुशलेमनिवासी जनहो, ऐका; तुमचा देव परमेश्वर
याच्यावर विश्वास ठेवा म्हणजे तुम्ही खंबीर व्हाल;
त्याच्या संदेष्ट्यांवर विश्वास ठेवा म्हणजे तुम्ही यशस्वी
व्हाल. २१ सैन्याबरोबर बाहेर जातांना परमेश्वराचा
धन्यवाद करा, कारण त्याची दया सनातन आहे, हें
स्तोत्र पावित्र्यानें मंडित होऊन गावें म्हणून त्यानें
प्रजेचा सल्ला घेऊन कित्येकांस त्या कामीं नेमिलें.
२२ ते हें स्तोत्र गाऊन स्तवन करूं लागले, तेव्हां
अम्मोनी, मवाबी व सेईर पहाडांतले लोक जे
यहूदावर चाल करून येत होते त्यांस गांठण्यास परमे-
श्वरानें दबा धरणारे बसविले व त्यांनीं त्यांचा मोड
केला. २३ अम्मोनी व मवाबी सेईर पहाडांतल्या
लोकांची अजिबात कत्तल उडवून त्यांचा विध्वंस करावा
म्हणून त्यांजवर उठले; सेईरनिवाश्यांचा निःपात केल्यावर
ते एकमेकांचा वध करूं लागले. २४ रानांतील
टेहळणीच्या बुरुजानजीक यहूदी लोकांनीं येऊन त्या
समुदायाकडे दृष्टि फेकिली तेव्हां चोहोंकडे जमिनीवर
प्रेतेंच प्रेतें पडलीं आहेत, कोणी निभावला नाहीं
असें त्यांस दिसून आलें. २५ यहोशाफाट व त्याचे
लोक लूट करावयास आले तेव्हां त्या प्रेतांमध्यें बहुत
धन, वस्त्रें[१] व मोलवान् अलंकार त्यांस मिळाले;
ते त्यांनीं इतके काढून घेतले कीं त्यांस ते वाहून नेतां

१ पाठभेद: प्रेतें

येईनात; लूट एवढी होती कीं ते ती तीन दिवसपर्यंत
करीत होते. २६ चौथ्या दिवशीं ते बराखा (आशीर्वाद)
नांवाच्या खोऱ्यांत एकवट झाले; तेथें त्यांनीं
परमेश्वराचा धन्यवाद केला; त्या स्थलाचें नांव बराखा
खोरें असें आजवर पडलें आहे. २७ मग सर्व यहूदांतले
लोक व यरुशलेमकर व त्यांच्या अग्रभागीं यहोशाफाट
हे मोठ्या आनंदानें यरुशलेमाकडे परत चालले,
व त्यांच्या अग्रभागीं यहोशाफाट होता. परमेश्वरानें
त्यांस आपल्या शत्रूंवर विजय प्राप्त करून देऊन
हर्षभरित केलें होतें. २८ ते सारंग्या, वीणा व
करणे वाजवीत यरुशलेमांत परमेश्वराच्या मंदिरीं
आले. २९ परमेश्वर इस्राएलाच्या शत्रूंशीं लढला हें
जेव्हां देशोदेशींच्या सर्व राज्यांतील लोकांनीं ऐकलें
तेव्हां देवाचा धाक त्यांस बसला. ३० अशा प्रकारें
यहोशाफाटाच्या राज्यास स्वास्थ्य मिळालें; कारण
त्याच्या देवानें त्यास चोहोंकडून आराम दिला.

३१ यहोशाफाटानें यहूदावर राज्य केलें; तो
पस्तीस वर्षांचा असतां राज्य करूं लागला; त्यानें
यरुशलेमांत पंचवीस वर्षें राज्य केलें; त्याच्या आईचें
नांव अजूबा, ती शिल्हीची कन्या. ३२ त्याची चाल-
चलणूक त्याचा बाप आसा याच्याप्रमाणें होती; ती
त्यानें सोडिली नाहीं; परमेश्वराच्या दृष्टीनें जें बरें तें
त्यानें केलें. ३३ तथापि उच्च स्थानें काढून टाकिलीं
नव्हतीं आणि लोकांनीं अद्यापि आपल्या वडिलांच्या
देवाकडे आपलें चित्त लाविलें नव्हतें. ३४ यहोशा-
फाटाचीं अथपासून इतिपर्यंत अवशिष्ट कृत्यें हनानीचा
पुत्र येहू याची जी बखर इस्राएलाच्या राजांच्या ग्रंथांत
नमूद केली आहे तिच्यांत लिहिलेलीं आहेत.

३५ यानंतर यहूदाचा राजा यहोशाफाट यानें
इस्राएलाचा राजा अहज्या याजशीं जूट केली; तो
अहज्या फार दुराचारी असे. ३६ गलबतें बांधून
तार्शीश येथें जातां यावें म्हणून त्यानें त्याजशीं भागी
केली; एसयोन-गेबर येथें त्यांनीं जहाजें बांधिलीं.
३७ तेव्हां मारेशावासी अलियेजर बिन दोदावाहू
यानें यहोशाफाटाविरुद्ध संदेश दिला; तो म्हणाला, तूं
अहज्याशीं भागी केली म्हणून तूं केलेलीं कामें
परमेश्वर मोडून टाकील. तीं जहाजें फुटून गेलीं,
तार्शीशास जाऊं शकलीं नाहींत.

२१ १ यहोशाफाट हा आपल्या पितरांजवळ
जाऊन निजला व त्यास त्याच्या पूर्वजांमध्यें
दावीदपुरांत मूठमाती देण्यांत आली; त्याचा
पुत्र यहोराम त्याच्या जागीं राजा झाला. २ त्याचे भाऊ
यहोशाफाटाचे पुत्र हे होत: अजऱ्या, यहीएल,
जखऱ्या, अजऱ्या मीखाएल व शफट्या, हे सर्व
इस्राएलाचा राजा यहोशाफाट याचे पुत्र होत.
३ त्यांच्या बापानें त्यांस सोनें, रुपें व अमूल्य चिजा
यांच्या मोठ्या देणग्या दिल्या आणि यहूदांतील
तटबंदीचीं नगरें दिलीं; पण यहोरामास त्यानें
राज्य दिलें, कारण तोच ज्येष्ठ पुत्र होता.
४ यहोराम आपल्या बापाच्या गादीवर कायम
होऊन बलाढ्य झाला, तेव्हां त्यानें आपल्या सर्व
भावांस व इस्राएलांच्या कांहीं सरदारांस तरवारीनें
वधिलें. ५ यहोराम बत्तीस वर्षांचा असतां राज्य करूं
लागला; त्यानें यरुशलेमांत आठ वर्षें राज्य केलें.
६ अहाबाच्या घराण्याप्रमाणें, इस्राएलाच्या राजांच्या
रीतीप्रमाणें तो चालला; त्यानें अहाबाच्या कन्येशीं
लग्न केलें; परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें
केलें. ७ तथापि जो करार परमेश्वरानें दाविदाशीं
केला होता त्यामुळें आणि त्यानें त्याचा व त्याच्या
वंशजांचा दीप सर्वकाळ राहील असें वचन दिलें
होतें त्यामुळें तो दाविदाचें घराणें नाहींसें करीना.
८ त्याच्या कारकीर्दीत अदोमानें यहूदाचें स्वामित्व
झुगारून देऊन आपला राजा नेमिला. ९ तेव्हां
यहोराम आपले सेनानायक व आपले सर्व रथ बरोबर
घेऊन तिकडे गेला. ज्या अदोमी लोकांनीं त्यास
घेरिलें होतें त्यांस व रथांच्या नायकांस त्यानें रात्रीच्या
वेळीं उठून मार दिला. १० अदोमानें यहूदाचें स्वामित्व
झुगारलें, दिलें तें आजवर तसेंच आहे. याच
सुमारास लिब्नानें त्याचें स्वामित्व झुगारून दिलें; त्यानें
आपल्या पूर्वजांचा देव परमेश्वर यास सोडिलें होतें

म्हणून असें झालें. ११ त्यानें आणखी यहूदाच्या
पहाडांवर उच्च स्थानें बांधिलीं आणि यरुशलेमांतल्या
रहिवाश्यांमध्यें व्यभिचारी मतीनें चालवयास
लावून यहूदास बहकविलें. १२ एलीया संदेष्ट्याकडून
त्यास एक लेख आला तो असा: तुझा पूर्वज दावीद
याचा देव परमेश्वर म्हणतो, तूं आपला बाप
यहोशाफाट याच्याप्रमाणें व यहूदाचा राजा आसा
याच्याप्रमाणें चालला नाहींस; १३ तर इस्राएलाच्या
राजांप्रमाणें चाललास आणि अहाबाच्या घराण्याप्रमाणें
यहूदी व यरुशलेमनिवासी यांस व्यभिचारी मतीनें
चालावयास लाविलें, त्याप्रमाणेंच तुझ्याहून चांगले असे
जे तुझ्या बापाच्या घराण्यांतील तुझे भाऊबंद त्यांचा
तूं वध केला, १४ यामुळें पाहा, तुझे लोक, तुझीं
मुलेंबाळें, तुझ्या स्त्रिया, व तुझें सर्व धन यांवर
परमेश्वर मोठा प्रहार करील; १५ तूं आंतड्यांच्या
रोगानें बहुत पीडा पावशील; तो रोग इतका वाढेल
कीं त्यामुळें दिवसानुदिवस तुझीं आंतडीं गळून
पडतील. १६ परमेश्वरानें पलिष्टी व कूशी लोकांच्या
शेजारचे अरबी लोक यांचीं मनें क्षुब्ध करून त्यांस
यहोरामावर उठविलें; १७ ते यहूदावर स्वारी करून
त्यांत घुसले, आणि राजमंदिरांत जितकी संपत्ति
मिळाली तितकी सर्व आणि राजपुत्र व राजस्त्रिया हीं
अवघीं त्यांनीं नेलीं; त्याचा कनिष्ठ पुत्र यहोआहाज[1]
याच्याखेरीज त्याच्यापाशीं कोणी पुत्र राहिला नाहीं.
१८ यानंतर परमेश्वरानें त्याच्या आंतड्यांस असाध्य
रोगाची पीडा लाविली. १९ उत्तरोत्तर त्या रोगाच्या
कारणानें त्याचीं आंतडीं गळत गेलीं आणि तो अत्यंत
पीडा भोगून दोन वर्षांच्या अंतीं मरण पावला. त्याच्या
वाडवडिलांसाठीं लोकांनीं जशीं धूपद्रव्यें जाळिलीं होतीं
तशीं त्याच्यासाठीं मुळींच जाळिलीं नाहींत. २० तो
राज्य करूं लागला तेव्हां बत्तीस वर्षांचा होता; त्यानें
आठ वर्षें यरुशलेमांत राज्य केलें; तो सर्वांस अप्रिय
होऊन मरण पावला; त्यास दावीदपुरांत मूठमाती
दिली, पण ती राजांच्या थडग्यांत दिली नाहीं.

[1] याचें नांव २२:१ येथें अहज्या असें आहे.

२२ १ यरुशलेमकरांनीं त्याच्या जागीं त्याचा
कनिष्ठ पुत्र अहज्या[1] यास राजा केलें, कारण जी
माणसांची टोळी अरबी लोकांबरोबर छावणींत
आली होती तिनें त्याच्या सर्व वडील पुत्रांचा वध
केला होता. या प्रकारें अहज्या बिन यहोराम हा
यहूदांचा राजा झाला. २ अहज्या राज्य करूं लागला
तेव्हां तो बेचाळीस[2] वर्षांचा होता. त्यानें यरुशलेमांत एक
वर्ष राज्य केलें. त्याच्या आईचें नांव अथल्या; ही
अम्रीची नात. ३ त्याची चालचलणूक अहाबाच्या
घराण्यासारखी होती, कारण दुष्कृत्यें करण्यास त्याची
आई त्यास सल्ला देत असे. ४ अहाबाच्या घराण्या-
प्रमाणें परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें केलें;
त्याच्या बापाच्या मृत्यूनंतर त्या घराण्यांतील लोकांनीं
त्यास असा सल्ला दिला कीं त्यायोगें त्याचा
नाश झाला. ५ तो त्यांच्या मसलतीनें इस्राएलाचा
राजा यहोराम बिन अहाब याच्याबरोबर रामोथगिलाद
येथें अरामाचा राजा हजाएल याजशीं लढावयास
गेला, तेव्हां अरामी लोकांनीं योरामास घायाळ केलें.
६ तो हजाएलाशीं रामा येथें लढतांना अरामी
लोकांच्या हातून जे घाय त्यास झाले होते ते बरे
व्हावे म्हणून तो इज्रेल येथें गेला. अहाबाचा पुत्र
यहोराम हा इज्रेल येथें आजारी होऊन पडला होता
म्हणून यहूदाचा राजा यहोराम याचा पुत्र अजऱ्या[3]
त्याच्या समाचारास गेला. ७ अहज्याचा नाश देवा-
कडून झाला, कारण त्यानें योरामाची संगति धरिली
होती; अहाबाच्या घराण्याचा उच्छेद करावा म्हणून
परमेश्वरानें येहू बिन निमशी यास अभिषिक्त केलें
होतें; त्याच्याशीं सामना करावा म्हणून तो तेथें
येऊन यहोरामाबरोबर निघाला होता. ८ येहू
अहाबाच्या घराण्यास शासन करीत असतां
यहूदाचे सरदार व अहज्याचे पुतणे हे अहज्याच्या

[1] अथवा: यहोआहाज; २१:१७ पाहा.

[2] अथवा: बावीस; २ राजे ८:२३ पाहा.

[3] अथवा: अहज्या: २२:१ पाहा. [2] अथवा: यहोशेबा: २ राजे ११:२ पाहा.

सेवेस असलेले त्यास आढळले; तेव्हां त्यानें त्यांचा
वध केला. ९ त्यानें अहज्याचा शोध लाविला; त्यास
त्याच्या लोकांनीं पकडिलें; तो शोमरोन येथें लपून
राहिला होता; त्यांनीं त्यास येहूकडे नेऊन त्याचा
वध केला व त्यास मूठमाती दिली; ते म्हणाले, जो
यहोशाफाट परमेश्वरास जिवेंभावें शरण गेला त्याचा
हा पुत्र. अहज्याच्या घराण्यांत राज्य करण्यास समर्थ
असा कोणी उरला नाहीं.

१० अहज्याची आई अथल्या हिनें आपला पुत्र
मेला असें पाहिलें तेव्हां तिनें उठून सर्व राजवंशाचा
संहार केला. ११ तरी राजकन्या यहोशबाथ हिनें
अहज्याचा पुत्र योवाश यास त्या वधावयाच्या राज-
पुत्रांतून चोरून नेलें आणि बिछाने ठेवण्याच्या कोठडींत
त्याच्या दाईनें त्याला छपवून ठेविलें. याप्रमाणें यहोराम
राजाची कन्या जी यहोयादा याजकाची पत्नी यहोश-
बाथ (जी अहज्याची बहीण होती) तिनें योवाशाला
अथल्येपासून छपविलें म्हणून तिला त्याचा वध करितां
आला नाहीं. १२ देवाच्या मंदिरांत त्यास सहा वर्षे
छपवून ठेविलें होतें; तेव्हां अथल्येनें देशावर राज्य केलें.

२३ १ सातव्या वर्षी यहोयादानें आपली मज-
बुती करून शतपति अजऱ्या बिन यरोहाम,
इश्माएल बिन यहोहानान, अजऱ्या बिन ओबेद,
मासेया बिन अदाया आणि अलीशाफाट बिन जिक्री
यांच्याशीं करार करून त्यांस आपल्या पक्षाचें केलें.
२ त्यांनीं यहूदा देशभर फिरून त्यांतील सर्व नगरांतून
लेवी आणि इस्राएलाच्या पितृकुळांचे प्रमुख पुरुष यांस
एकवट केलें आणि ते यरुशलेमास आले. ३ सर्व
मंडळीनें देवाच्या मंदिरांत राजाशीं करार केला.
यहोयादा त्यांस म्हणाला, दाविदाच्या वंशजांविषयीं
परमेश्वरानें सांगितलें आहे त्याप्रमाणें राजपुत्रानें गादीवर
बसावें. ४ तुम्हांस करावयाचें तें हेंच कीं तुमच्यांतल्या
याजकांपैकीं व लेव्यांपैकीं एकतृतीयांश लोक शब्बाथ
दिवशीं येत असतात, त्यांनीं द्वारपालांचें काम करावें;
५ एकतृतीयांश लोकांनीं राजमंदिरावर पहारा करावा
आणि एकतृतीयांश लोकांनीं तळाच्या वेशीपाशीं असावें
आणि बाकीच्या सर्व लोकांनीं परमेश्वराच्या मंदिराच्या
अंगणांत राहावें. ६ याजक व सेवा करणारे लेवी
यांखेरीज कोणी देवाच्या मंदिरांत येऊं नये; त्यांनींच
मात्र आंत यावें, कारण ते पवित्र होत; बाकीच्या
सर्व लोकांनीं परमेश्वराच्या मंदिराचा पहारा करावा.
७ लेव्यांपैकीं प्रत्येक मनुष्यानें आपआपल्या हातीं शस्त्रें
घेऊन राजासभोवतीं उभें राहावें; कोणी मंदिराच्या
आंत आला कीं त्यास मारून टाकावें; राजा आंत बाहेर
येईल जाईल तेव्हां तुम्हीं त्याजबरोबर असावें.
८ यहोयादा याजकाच्या आज्ञेप्रमाणें लेव्यांनीं व सर्व
यहूद्यांनीं केलें; त्यांतल्या प्रत्येकानें शब्बाथ दिवशीं
आंत येण्याची ज्यांची पाळी असे व कामावरून परत
जाण्याची ज्यांची पाळी असे त्यांची व्यवस्था केली;
यहोयादा याजकानें कोणत्याहि पाळीपाळीनें येणाऱ्या
लेव्यांस निरोप दिला नव्हता. ९ दावीद राजाचे भाले,
बर्च्या व ढाली जीं देवाच्या मंदिरांत होतीं तीं यहोयादा
याजकानें घेऊन शतपतींना दिलीं. १० त्यानें प्रत्येक
मनुष्यास आपआपल्या हातीं हत्यार घेऊन मंदिराच्या
वेदीच्या व मंदिराच्या जवळ राजासभोवतीं उजव्या व
डाव्या बाजूस उभें राहावयास सांगितलें. ११ मग
त्यानें राजकुमारास बाहेर आणून त्याच्या शिरीं मुकुट
ठेविला आणि त्यास आज्ञापट देऊन राजा केलें; यहोयादा
व त्याचे पुत्र यांनीं त्यास अभिषेक केला; तेव्हां सर्व लोक
म्हणाले, राजा चिरायु होवो. १२ लोक धावतपळत
आहेत व राजाची स्तुति करीत आहेत, ही गडबड
ऐकून अथल्या परमेश्वराच्या मंदिरांत लोकांकडे आली;
१३ आणि पाहते तों राजा प्रवेशस्थानीं आपल्या
नेहमींच्या स्तंभापाशीं उभा आहे, सेनानायक व करणे
वाजविणारे राजाजवळ आहेत; देशाचे सर्व लोक
करणे वाजवून आनंद करीत आहेत; गाणारे व स्तवन
शिकविणारे वाद्यें वाजवीत आहेत; हें अथल्येच्या दृष्टीस
पडलें तेव्हां ती आपलीं वस्त्रें फाडून फितुरी रे फितुरी!
असें म्हणाली. १४ मग यहोयादा याजकानें सेनेवरील
शतपतींस बाहेर आणून आज्ञा केली कीं तिला सैन्याच्या

१ अथवा: यहोशेबा; २ राजे ११:२ पाहा.

रांगेतून बाहेर काढा; तिच्यामागून जो आईल त्याचा
वध करा; कारण परमेश्वराच्या मंदिरांत तिचा वध
होऊं नये असें याजकानें सांगितलें. १५ तेव्हां त्यांनीं
तिला जाण्यासाठीं वाट केली; राजमंदिरीं जाण्याच्या घोड-
वेशीनें ती निघून गेली; तेथें त्यांनीं तिला जिवें मारिलें.
१६ यानंतर यहोयादा, राजा व प्रजा यांनीं
परमेश्वराचे लोक व्हावें म्हणून यहोयादानें त्यांजकडून
परमेश्वराशीं करार करविला. १७ तेव्हां सर्व लोकांनीं
बालदैवताच्या देवळांत जाऊन तें मोडून त्याच्या वेद्या
व मूर्ति यांचा भुगाभुगा केला आणि बालाचा याजक
मत्तान याचा वेद्यांसमोर वध केला. १८ मोशाच्या नियम-
शास्त्रांत लिहिलें आहे त्याप्रमाणें व दाविदानें नेमून
दिलेल्या क्रमाप्रमाणें परमेश्वरास होमबलि अर्पून
आनंदानें गायन करावें म्हणून दाविदानें लेवीय
याजकांची परमेश्वराच्या मंदिरांत वांटणी करून दिली
होती; त्यांच्या हातीं यहोयादानें परमेश्वराच्या मंदिराचे
अधिकार सोपविले. १९ कोणत्याहि प्रकारें कोणी
अशुद्ध असला तर त्याचा आंत प्रवेश होऊं नये म्हणून
त्यानें परमेश्वराच्या दाराशीं द्वारपाळ नेमिले. २० शत-
पति, अमीरउमराव, लोकांचे सुभे व देशचे सर्व लोक
यांस त्यानें बरोबर घेऊन परमेश्वराच्या मंदिरांतून
राजास बाहेर आणिलें; ते वरच्या वेशींतून निघून
राजमंदिरांत आले आणि राजा राजासनावर बसला.
२१ या प्रकारें देशचे सर्व लोक आनंदित झाले व
नगरांत शांतता झाली; अथल्येचा त्यांनीं तरवारीनें
वध केला.

२४ १ योवाश राज्य करूं लागला तेव्हां तो
सात वर्षांचा होता; त्यानें चाळीस वर्षें यरुश-
लेमांत राज्य केलें; त्याच्या आईचें नांव सिब्या;
ती बैर-शेबा येथली. २ यहोयादा याजक याच्या सर्व
हयातींत योवाश हा परमेश्वराच्या दृष्टीनें जें नीट तें
करीत असे. ३ यहोयादानें त्यास दोन बायका करून
दिल्या; त्यास पुत्र व कन्या झाल्या. ४ यानंतर परमे-
श्वराच्या मंदिराचा जीर्णोद्धार करावा असें योवाशाच्या
मनांत आलें; ५ म्हणून त्यानें याजक व लेवी यांस
एकत्र करून म्हटलें, वर्षानुवर्ष तुमच्या देवाच्या
मंदिराची दुरुस्ती व्हावी म्हणून तुम्ही यहूदाच्या सर्व
नगरांत जा व सर्व इस्राएलापासून पैसा जमा करा;
हें कार्य त्वरित करा असें त्यानें सांगितलें असतांहि
लेव्यांनीं तें त्वरेनें केलें नाहीं. ६ राजानें त्यांचा नायक
यहोयादा यास बोलावून विचारिलें, आज्ञापटाच्या
तंबूसाठीं परमेश्वराचा सेवक मोशे आणि इस्राएलाची
मंडळी यांनीं वहिवाट लावून दिल्याप्रमाणें यहूदा
आणि यरुशलेम यांतल्या लोकांपासून लेव्यांना कर
जमा करावयास कां सांगितलें नाहीं? ७ त्या दुष्ट
अथल्येच्या पुत्रांनीं देवाचें मंदिर मोडूनतोडून टाकिलें
होतें आणि परमेश्वराच्या मंदिरांतील सगळ्या समर्पित
वस्तु त्यांनीं बालदैवतांला वाहिल्या होत्या. ८ राजाज्ञे-
वरून लोकांनीं एक पेटी तयार करून परमेश्वराच्या
मंदिराच्या दरवाजाबाहेर ठेविली. ९ मग यहूदाभर
व यरुशलेमभर असें जाहीर करण्यांत आलें कीं
देवाचा सेवक मोशे यानें रानांत इस्राएलांवर जो कर
बसविला होता तो परमेश्वराप्रीत्यर्थ लोकांनीं आणावा.
१० तेव्हां सर्व सरदार व सर्व प्रजाजन मोठ्या आनंदानें
येऊन पुरेसी रक्कम जमेपर्यंत त्या पेटींत पैसे टाकीत
होते. ११ लेव्यांच्या हातून राजाच्या प्रधानाकडे
ती पेटी पोंचती होई व तिच्यांत बराच पैसा
आहे असें त्यांच्या नजरेस पडलें म्हणजे राजाचा
चिटणीस व मुख्य याजकाचा नायक हे येऊन ती
पेटी रिकामी करीत, मग ती परत जागच्या जागीं
नेऊन ठेवीत. त्यांनीं दिवसानुदिवस असें करून पुष्कळ
पैसा जमविला. १२ मग राजानें व यहोयादानें तो
पैसा परमेश्वराच्या मंदिराचें काम करण्यास दिला व
त्यांनीं परमेश्वराच्या मंदिराचा जीर्णोद्धार करण्यासाठीं
रोजानें गवंडी व सुतार लाविले आणि परमेश्वराच्या
मंदिराची दुरुस्ती करण्यासाठीं लोखंडी व पितळी काम
करणाऱ्या कारागिरांना कामास लाविलें. १३ या
प्रकारें कारागिरांनीं कामास लागून तें पुरें केलें; त्यांनीं
देवाचें मंदिर नीटनेटकें करून त्यास मजबुती आणिली.
१४ तें सर्व काम आटोपल्यावर बाकी राहिलेले पैसे

त्यानें नेऊन राजास व यहोयादास दिले; परमेश्वराच्या मंदिराप्रीत्यर्थ त्या पैशांचीं सेवेचीं व अर्पणाचीं पात्रें, चमचे आणि सोन्यारुप्याचीं इतर पात्रें बनविलीं. यहोयादाच्या आयुष्यभर परमेश्वराच्या मंदिरांत होमबलि नित्य अर्पीत असत. १५ पुढें यहोयादा वृद्ध व पुऱ्या वयाचा होऊन मृत्यु पावला; तो मृत्यु पावला तेव्हां त्याचें वय एकशेंतीस वर्षांचें होतें. १६ त्यास दावीदपुरांत राजांमध्यें मूठमाती देण्यांत आली, कारण त्यानें इस्राएलांत देव व त्याचें मंदिर यांच्यासंबंधानें चांगलें काम केलें होतें. १७ यहोयादा मरण पावल्यानंतर यहूदाच्या सरदारांनीं राजाकडे जाऊन त्यास मुजरा केला व राजानें त्यांचें म्हणणें ऐकलें. १८ मग ते आपल्या पूर्वजांचा देव परमेश्वर याच्या मंदिराचा त्याग करून अशेरा मूर्ति व इतर मूर्ति यांची उपासना करूं लागले; या त्यांच्या अपराधामुळें परमेश्वराचा क्रोध यहूदावर व यरुशलेमावर भडकला. १९ तरी त्यांस आपणाकडे परत आणावें म्हणून परमेश्वरानें त्यांजकडे संदेष्टे पाठविले; त्यांनीं त्यांचा निषेध केला पण ते कांहीं ऐकतना. २० मग परमेश्वराचा आत्मा यहोयादा याजकाचा पुत्र जखऱ्या याच्या ठायीं आला; त्यानें उंच जागीं उभें राहून लोकांस म्हटलें, देव म्हणतो, तुम्ही परमेश्वराची आज्ञा कां उल्लंघितां ? अशानें तुम्हांस यश येणार नाहीं; तुम्हीं परमेश्वरास सोडिलें म्हणून त्यानेंहि तुम्हांस सोडिलें आहे. २१ मग त्यांनीं त्याजविरुद्ध कट करून राजाज्ञेनें परमेश्वराच्या मंदिराच्या अंगणांत त्यास दगडमार केला. २२ याप्रमाणें त्याचा बाप यहोयादा यानें केलेले उपकार योवाश राजा स्मरला नाहीं, पण त्यानें त्याच्या पुत्रास वधिलें. त्याच्या मृत्युसमयीं तो म्हणाला, परमेश्वरा, हें अवलोकन करून याचें उसनें फेड. २३ नवें वर्ष लागतांच अराम्यांच्या सेनेनें त्याजवर स्वारी केली; ते यहूदा व यरुशलेम यांजवर चालून येऊन त्यांनीं लोकांपैकीं सरदार होते त्यांचा नायनाट केला व त्यांचें सर्व धन लुटून दिमिष्काच्या राजाकडे पाठवून दिलें. २४ अराम्यांच्या सैन्यांत फार थोडे लोक होते तरी परमेश्वरानें त्यांच्या हातीं एक फार मोठें सैन्य लागूं दिलें, कारण त्यांनीं आपल्या पूर्वजांच्या देव परमेश्वर याचा त्याग केला होता. या प्रकारें त्यांनीं योवाशाला शासन केलें. २५ ते त्याला मोठाल्या जखमांनीं घायाळ करून निघून गेले, तेव्हां त्याच्या सेवकांनीं यहोयादा याजकाच्या पुत्राच्या खुनाकरितां त्याजशीं फितुरी करून तो बिछान्यावर पडला असतांना त्याजवर प्रहार करून त्याला ठार केलें. त्यांनीं त्यास दावीदपुरांत मूठमाती दिली, राजांच्या कबरस्तानांत दिली नाहीं. २६ ज्यांनीं त्याजशीं फितुरी केली ते हे: शिमथ अम्मोनीण हिचा पुत्र [1]जाबाद व मवाबीण शिम्रिथ[2] हिचा पुत्र यहोजाबाद. २७ योवाशाचे पुत्र, त्याला सांगितलेली मोठी शिक्षा व देवाच्या मंदिराचा जीर्णोद्धार यांविषयीं सर्व कांहीं राजांच्या बखरींत पुस्तकांत लिहिलें आहे. त्याच्या जागीं त्याचा पुत्र अमस्या हा राजा झाला.

२५ १ अमस्या राज्य करूं लागला तेव्हां पंचवीस वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत एकुणतीस वर्षें राज्य केलें; त्याच्या आईचें नांव यहोअदान होतें; ती यरुशलेमची होती. २ परमेश्वराच्या दृष्टीनें जें नीट तें त्यानें केलें, पण तें खऱ्या अंतःकरणानें केलें नाहीं. ३ त्याच्या हातीं राज्य कायम झालें तेव्हां ज्या त्याच्या सेवकांनीं त्याचा बाप राजा यास वधिलें होतें त्यांस त्यानें जिवें मारिलें; ४ पण त्यांच्या मुलांबाळांस त्यानें मारिलें नाहीं. मुलामुळें बापास मारूं नये व बापामुळें मुलास मारूं नये, ज्यानें पाप केलें तोच आपल्या पापास्तव मरावा अशी जी परमेश्वराची आज्ञा मोशाच्या नियमशास्त्रांत लिहिली आहे तिच्याप्रमाणें त्यानें केलें. ५ अमस्यानें अवघा यहूदा व बन्यामीन मिळविला व त्यांच्या पितृकुळांप्रमाणें त्यांजवर सहस्रपति व शतपति नेमून दिले; जे वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे होते त्यांची त्यानें गणती केली तेव्हां युद्ध करावयाजोगे व भाला व ढाल धारण करण्याजोगे तीन लाख निवडक

१ **अथवा**: जोजाखार: २ राजे १२:२१ पाहा.
२ **अथवा**: शोमर: २ राजे १२:२१ पाहा.

लोक भरले. ६ त्याप्रमाणेंच त्यानें शंभर किक्कार चांदी देऊन एक लाख इस्राएल योद्धे चाकरीस ठेविले; ७ पण देवाचा एक माणूस त्याजकडे येऊन म्हणाला, हे राजा, इस्राएलाच्या सेनेनें तुजबरोबर जाऊं नये, कारण परमेश्वर इस्राएलाच्या म्हणजे सर्व एफ्राईम वंशजांच्या बरोबर नाहीं; ८ पण तूं जाणारच तर मर्दुमकी कर; युद्ध करण्याची हिंमत बांध. देव तुला आपल्या शत्रूपुढें चीत करील; साहाय्य करण्यास व चीत करण्यास देवाला सामर्थ्य आहे. ९ अमस्यानें देवाच्या माणसास विचारिलें, मी शंभर किक्कार रुपें इस्राएल सैन्यास देऊन चुकलों आहें त्याच्यासंबंधानें मी काय करूं? देवाच्या माणसानें उत्तर दिलें, तुला याहूनहि अधिक देण्याची परमेश्वरास ताकद आहे. १० मग एफ्राइमाहून जें सैन्य त्याजकडे आलें होतें त्यानें स्वस्थानीं परत जावें म्हणून अमस्यानें तें निराळें केलें; तेव्हां यहूदावर त्यांचा राग फार भडकला व ते अत्यंत क्रोधायमान होऊन स्वस्थानीं परत गेले. ११ अमस्यानें हिंमत करून आपल्या लोकांस युद्धास नेलें; क्षारखोऱ्यांत जाऊन सेइर वंशजांपैकीं दहा हजार लोक त्यानें वधिले. १२ यहूदी लोकांनीं आणखी दहा हजार पाडाव केले व त्यांस पर्वतशिखरावर नेऊन त्यांचा कडेलोट केला, आणि त्यांचा चुराडा झाला; १३ पण जें सैन्य लढाईस आपल्याबरोबर न नेतां अमस्यानें परत लावून दिलें होतें त्यानें शमरोनापासून बेथ-होरोनापर्यंत यहूदाच्या नगरांवर हल्ला केला; यांनीं त्यांतल्या तीन हजारांस ठार करून पुष्कळ लूट नेली.

१४ अदोम्यांचा संहार करून परत आल्यावर अमस्यानें सेइर लोकांचीं दैवतें आणून त्यांस आपले देव मानिले आणि तो त्यांची उपासना करूं लागला व त्यांच्यापुढें धूप जाळूं लागला. १५ तेव्हां अमस्यावर परमेश्वराचा कोप भडकला व त्यानें त्याजकडे एक संदेष्टा पाठविला; तो त्यास म्हणाला, ज्या मूर्तीला आपल्या लोकांस तुझ्या हातांतून सोडवितां आलें नाहीं त्यांच्या भजनीं तूं कां लागलास? १६ तो त्याला असें बोलूं लागला तेव्हां राजा त्यास म्हणाला, मीं तुला आपला मंत्री केलें आहे काय? गप्प राहा; तुला मार पाहिजे काय? तेव्हां संदेष्टा गप्प राहिला. मग तो म्हणाला, मला ठाऊक आहे कीं देवानें तुझा नाश करण्याचें ठरविलें आहे, कारण तूं हें असें केलें आहे व माझा सल्ला घेतला नाहीं.

१७ मग यहूदाचा राजा अमस्या यानें मसलत घेऊन इस्राएलाचा राजा योवाश[1] बिन यहोआहाज बिन येहू याजकडे निरोप पाठविला कीं चल, आपण एकमेकांसमोर उभे राहूं. १८ इस्राएलाचा राजा योवाश यानें यहूदाचा राजा अमस्या यांस सांगून पाठविलें कीं लबानोनांतल्या कांटेझुडपानें लबानोनांतल्या एका गंधसरूकडे मागणी केली कीं तुझी मुलगी माझ्या मुलास दे; लबानोनांत असलेला एक वनपशु त्या वाटेनें गेला, त्यानें तें कांटेझुडूप पायाखालीं तुडवून टाकिलें. १९ तूं म्हणतोस, मीं अदोमाचा मोड केला; त्यामुळें तुझें हृदय उन्मत्त होऊन तूं फुशारकी मारीत आहेस; आपल्या घरीं बैस; तूं पतन पावशील व तुजबरोबर यहूदा पतन पावेल; तूं आपण होऊन अरिष्टास कां आमंत्रण करीत आहेस? २० अमस्या कांहीं केल्या ऐकेना; कारण ते अदोमाच्या दैवतांच्या नादीं लागले होते म्हणून त्यांस त्यांच्या शत्रूंच्या स्वाधीन करावें असा देवाचा संकेत झाला होता. २१ तेव्हां इस्राएलाचा राजा योवाश चढाई करून गेला; तो व यहूदाचा राजा अमस्या यांचा यहूदा देशांतील बेथ-शेमेश येथें सामना झाला. २२ इस्राएलापुढें यहूदाची त्रेधा उडाली आणि ज्यानें-त्यानें आपापल्या डेऱ्याकडे पळ काढिला. २३ इस्राएलाचा राजा योवाश यानें यहूदाचा राजा अमस्या बिन योवाश बिन यहोआहाज यास बेथ-शेमेश येथें पकडून यरुशलेमास नेलें; आणि त्यानें एफ्राईमी वेशीपासून कोपऱ्यावरील वेशीपर्यंत यरुशलेमाचा चारशें हात कोट पाडून टाकिला. २४ जेवढें सोनें, रुपें व पात्रेंहि देवाच्या मंदिरांत ओबेथ-अदोम याजपाशीं

१ **अथवा:** यहोआश (त्याप्रमाणेंच १८,२१,२३ व २५ व्या ओव्यांत); २ राजे १४:८ पाहा.

त्याला सांपडलीं तेवढीं सगळीं व राजमंदिरां-
तील खजिना व कैदी घेऊन तो शोमरोनास
परत गेला.

२५ इस्राएलाचा राजा योवाश बिन यहोआहाज
याच्या मृत्यूनंतर यहूदाचा राजा अमस्या बिन योवाश
पंधरा वर्षे जगला. २६ अमस्याचीं अथपासून इति-
पर्यंत बाकीचीं कृत्यें यहूदा व इस्राएल यांच्या राजांच्या
बखरीत वर्णिलेलीं आहेत, नाहींत काय? २७ अमस्यानें
परमेश्वरास अनुसरण्याचें सोडून दिलें तेव्हां यरुशलेमांत
त्याजविरुद्ध कट झाल्यामुळें तो लाखीश येथें पळून
गेला, पण लोकांनीं त्याच्या पाठोपाठ लाखीश येथें
माणसें पाठवून त्याला ठार केलें; २८ त्यास घोड्यावर
घालून आणिलें आणि यहूदाच्या राजधानींत त्याच्या
पूर्वजांमध्यें त्यास मूठमाती दिली.

२६ १ उज्जीया सोळा वर्षांचा असतांना सर्व
यहूदी लोकांनीं त्यास त्याचा बाप अमस्या याच्या
जागीं राजा केलें. २ अमस्या राजा आपल्या
पितरांजवळ जाऊन निजल्यावर उज्जीयानें एलोथाची
मजबुती करून पुनः तें यहूदाच्या सत्तेंत आणिलें.
३ उज्जीया राज्य करूं लागला तेव्हां तो सोळा वर्षांचा
होता; त्यानें यरुशलेमांत बावन्न वर्षे राज्य केलें; त्याच्या
आईचें नांव यखिल्या; ती यरुशलेमाची होती.
४ त्याचा बाप अमस्या याच्या एकंदर वागणुकीस
अनुसरून परमेश्वराच्या दृष्टीनें जें नीट तें तो करी.
५ देवाचे दृष्टांत जाणणारा जखऱ्या याच्या वेळीं तो
देवाच्या भजनीं लागलेला असे; देवाच्या भजनीं जोंवर
तो लागला होता तोंवर त्यानें त्याचें कल्याण
केलें. ६ त्यानें जाऊन पलिष्ट्यांशीं युद्ध केलें; गथ,
यब्ने व अश्दोद यांचे कोट पाडून टाकिले आणि
अश्दोदाच्या आसपास व पलिष्ट्यांमध्यें त्यानें नगरें
वसविलीं. ७ पलिष्टी, गुर-बालवासी अरब व मऊनी
यांच्याविरुद्ध देवानें त्यास साहाय्य केलें. ८ अम्मोनी
लोक उज्जीयास कर देत असत. त्याची कीर्ति मिसर
देशाच्या सीमेपर्यंत जाऊन पसरली, कारण तो महा-
समर्थ झाला. ९ उज्जीयानें यरुशलेमांत कोंपऱ्याच्या
वेशीजवळ, खोऱ्याच्या वेशीजवळ आणि कोट वळसा
घेतो तेथें बुरूज बांधून त्यांस बळकटी आणिली.
१० त्याचीं पुष्कळ जनावरें होतीं म्हणून त्यानें जंगलांत,
तळवटींत व माळांत बुरूज बांधिले व पुष्कळ
हौद खोदिले. पहाडांत व कर्मेलांत त्याचे शेतकरी व
द्राक्षीचे मळेकरी असत, कारण त्याला शेतकीचा फार
शोक असे. ११ उज्जीयाजवळ लढाऊ लोकांचें सैन्य
असे; राजाच्या सेनानायकांपैकीं एक हनन्या म्हणून
होता, त्याच्या हाताखालच्या ईयेल लेखक व मासेया
कारभारी हे गणती करीत, तदनुसार तें सैन्य टोळी-
टोळीनें लढाईस जात असे. १२ पितृकुळांतील
प्रमुख पुरुष जे शूर वीर असत त्यांची एकंदर संख्या
दोन हजार सहाशें होती. १३ त्यांच्या अधिकाराखालीं
तीन लक्ष सात हजार पांचशें एवढी कवायत शिक-
लेली फौज होती; शत्रूच्या विरुद्ध राजास कुमक
करण्यास ते मोठ्या शौर्यानें लढत. १४ या सर्व सेने-
साठीं उज्जीयानें ढाली, भाले, शिरस्त्राणें, उरस्त्राणें,
धनुष्यें व गोफणगुंडे तयार केले. १५ यरुशलेमाच्या
बुरुजांवर व प्राकारांवर चतुर कारागिरांनीं नवीन
काढलेलीं यंत्रेंहि त्यानें ठेविलीं; त्या यंत्रांनीं बाण व
मोठे धोंडे फेकून मारितां येत असत. त्याची कीर्ति
दूरवर पसरली; त्यास इतकें विलक्षण साहाय्य मिळालें
कीं तो महासामर्थ्यवान् झाला.

१६ तो समर्थ झाला तेव्हां त्याचें हृदय उन्मत्त
होऊन तो बिघडला, आणि आपला देव परमेश्वर याच्या
आज्ञेचें त्यानें उल्लंघन केलें; धूपवेदीवर धूप जाळण्या-
साठीं तो परमेश्वराच्या मंदिरांत गेला. १७ अजऱ्या
याजक व त्याजबरोबर परमेश्वराचें याजकपण करीत
असलेले ऐशीं वीर पुरुष त्याच्या पाठोपाठ आंत गेले;
१८ त्यांनीं उज्जीया राजाचा प्रतिकार करून म्हटलें,
हे उज्जीया, परमेश्वराप्रीत्यर्थ धूप जाळणें हें तुझें काम
नव्हे; अहरोनाचे वंशज जे याजक, ज्यांना धूप जाळ-
ण्यासाठीं पवित्र केलें आहे, त्यांचेंच हें काम आहे; तूं
पवित्रस्थानांतून निघून जा, कारण तूं मर्यादेचें उल्लंघन

१ याचें नांव २ राजे १४:२१ येथें अजऱ्या असें आहे.

केलें आहे; अशानें परमेश्वर देवाकडून तुझें गौरव होणार
नाहीं. १९ तेव्हां उज्जीयास क्रोध आला. धूप जाळण्या-
साठीं त्यानें हातांत धुपाटणें घेतलें होतें; आणि तो
याजकांवर संतापला असतां, त्यांच्यादेखत परमे-
श्वराच्या मंदिरांत धूपवेदीजवळ त्याच्या कपाळावर कोड
उठलें. २० अजऱ्या मुख्य याजक व दुसरे सर्व याजक
यांनीं पाहिलें तों त्याच्या कपाळावर कोड उठलें आहे
असें त्यांच्या दृष्टीस पडलें; तेव्हां त्यांनीं त्यास तेथून
लवकर घालवून दिलें; परमेश्वरानें आपणास तडाका दिला
आहे हें जाणून तोहि उतावळीनें बाहेर निघाला.
२१ उज्जीया राजा आमरण कोडी राहिला; तो कोडी
असल्यामुळें एका घरांत निराळा राहत असे;
त्यास परमेश्वराचें मंदिर वर्ज्य झालें, व त्याचा
पुत्र योथाम हा राजघराण्याचा कारभारी होऊन
देशच्या लोकांचें शासन करूं लागला. २२ उज्जीयाचीं
अथपासून इतिपर्यंत सर्व अवशिष्ट कृत्यें आमोजाचा
पुत्र यशया संदेष्टा यानें लिहिलीं आहेत. २३ उज्जीया
आपल्या पितरांजवळ जाऊन निजला; तो कोडी होता
म्हणून राजांच्या खासगी स्मशानभूमींत त्याला
मूठमाती दिली; त्याचा पुत्र योथाम त्याच्या जागीं
राजा झाला.

२७ १ योथाम राज्य करूं लागला तेव्हां तो पंच-
वीस वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत सोळा वर्षें
राज्य केलें; त्याच्या आईचें नांव यरूशा असें
होतें; ती सादोकाची कन्या. २ परमेश्वराच्या दृष्टीनें जें
ठीक तें त्यानें केलें; त्याचा बाप उज्जीया याच्या एकंदर
वागणुकीप्रमाणें तो वागला; मात्र परमेश्वराच्या मंदिरांत
त्यानें प्रवेश केला नाहीं. प्रजाजन अधिकाधिक बिघडत
चालले. ३ त्यानें परमेश्वराच्या मंदिराचा वरचा दरवाजा
बांधिला आणि ओफेलच्या कोटावर पुष्कळ बांधकाम
केलें. ४ त्यानें यहूदाच्या पहाडी देशांत शहरें वसविलीं
आणि वनांत गढ्या व बुरूज बांधिले. ५ त्यानें अम्मोनी
लोकांच्या राजाशीं लढून त्यांजवर वर्चस्व मिळविलें.
त्या वर्षी अम्मोनी लोकांनीं त्यास शंभर किक्कार चांदी,
दहा हजार कोर गहूं, दहा हजार कोर जव अशी
खंडणी दिली. दुसऱ्या व तिसऱ्या वर्षीहि अम्मोनी
लोकांनीं अशीच खंडणी दिली. ६ योथाम आपला देव
परमेश्वर यास स्मरून आपली वर्तणूक ठेवी म्हणून तो
समर्थ झाला. ७ योथामाचीं अवशिष्ट कृत्यें, त्याच्या
सर्व लढाया व त्याचें वर्तन हीं सर्व इस्राएल व यहूदी
यांच्या राजांच्या बखरींत वर्णिलीं आहेत. ८ तो राज्य
करूं लागला तेव्हां पंचवीस वर्षांचा होता व यरुश-
लेमांत त्यानें सोळा वर्षें राज्य केलें. ९ योथाम आपल्या
पितरांजवळ जाऊन निजला; त्यास दावीदपुरांत मूठमाती
दिली आणि त्याच्या जागीं त्याचा पुत्र आहाज हा
राजा झाला.

२८ १ आहाज राज्य करूं लागला तेव्हां
वीस वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत सोळा
वर्षें राज्य केलें; त्याचा पूर्वज दावीद यानें पर-
मेश्वराच्या दृष्टीनें जें ठीक तें केलें होतें त्याप्रमाणें
त्यानें केलें नाहीं. २ तो इस्राएलांच्या राजांच्या मार्गांनीं
चालला; त्यानें बाल दैवतांच्या ओतींव मूर्ति केल्या.
३ त्यानें हिन्नोमपुत्राच्या खोऱ्यांत धूप जाळिला आणि
ज्या राष्ट्रांस परमेश्वरानें इस्राएल लोकांपुढून घालवून
दिलें होतें त्यांच्या अमंगळ कृतींस अनुसरून त्यानें
आपल्या मुलांचा अग्नींत होम करून तीं अर्पिलीं. ४ तो
उच्च स्थानीं टेकड्यांवर व प्रत्येक हिरव्या वृक्षाखालीं यज्ञ
करी व धूप जाळी; ५ म्हणून त्याचा देव परमेश्वर यानें
त्यास अरामी लोकांच्या राजाच्या हातीं दिलें; त्यांनीं त्यास
जिंकून त्याचे पुष्कळ लोक पाडाव करून दिमिष्कास नेले.
याशिवाय त्यास इस्राएलाच्या राजाच्या हातीं दिलें,
त्यानें मोठी कत्तल उडवून त्यास जेर केलें. ६ रमाल्याचा
पुत्र पेकह यानें एका दिवसांत यहूदांतल्या एक
लक्ष वीस हजार शूर वीरांचा संहार केला, कारण
त्यांनीं आपल्या वडिलांचा देव परमेश्वर यांस सोडून
दिलें होतें. ७ एफ्राइमांतल्या एका जिख्री नामक महा-
वीरानें राजपुत्र मासेया, घरकारभारी अज्रीकाम व
राजाचा नायक एलकाना यांचा वध केला. ८ इस्राएल
लोकांनीं आपल्या भाऊबंदांच्या स्त्रिया, पुत्र व कन्या
मिळून दोन लक्ष माणसें पाडाव करून नेलीं आणि

त्यांस पुष्कळ लुटून ती लूट शोमरोनास नेली. ९ त्या
समयीं ओदेद नांवाचा परमेश्वराचा एक संदेष्टा तेथें
होता; शोमरोनास सैन्य परत आलें त्यास मार्गांत गांठून
तो म्हणाला, पाहा, तुमच्या पूर्वजांचा देव परमेश्वर हा
यहूदावर रागावला म्हणून त्यानें त्यांस तुमच्या हातीं
दिलें; तुम्हीं इतक्या क्रोधानें त्यांची कत्तल केली कीं तो
गगनापर्यंत पोहंचला आहे. १० यहूदी व यरुशलेमकर
यांस आपले दास व दासी करून ठेवावें असा
तुमचा इरादा आहे; तर तुम्हीहि आपला देव परमेश्वर
याचे अपराधी नाहीं काय? ११ तर आतां माझें
ऐका; तुम्ही आपल्या पाडाव केलेला भाऊबंदांस
परत पाठवून द्या, कारण परमेश्वराचा कोप तुम्हांवर
अतिशयित भडकला आहे. १२ तेव्हां एफ्राइमांतले
कित्येक मुख्यमुख्य पुरुष म्हणजे अजऱ्या बिन योहा-
नान, बरेख्या बिन मशिल्लेमोथ, यहिज्कीया बिन शल्लूम
आणि अमासा बिन हद्लाई हे लढाईहून परत येणाऱ्यांस
आडवे जाऊन म्हणाले, १३ या पाडाव केलेल्या
लोकांस आंत आणूं नका; तुम्ही जो संकल्प केला
आहे त्याच्यामुळें आम्ही परमेश्वराचे अपराधी होऊं
व आमच्या पापांत व दोषांत भर पडेल; आमचा
दोष तर मोठा आहे आणि इस्राएलावर बहुत कोप
भडकला आहे. १४ तेव्हां त्या हत्यारबंद लोकांनीं ते
पाडाव केलेले लोक आणि आणिलेली लूट हीं सरदार
व सर्व मंडळी यांच्यासमक्ष सोडून दिली. १५ मग
वर नांवें सांगितलेल्या पुरुषांनीं पाडाव केलेल्या
लोकांतल्या उघड्यानागड्यांस लुटींतलीं वस्त्रें नेसविलीं,
जोडे घालावयास दिले, त्यांस खाऊंपिऊं घातलें,
त्यांस तैलाभ्यंग केला आणि सर्व निर्बल लोकांस
गाढवांवर बसवून खर्जूर नगर जें यरीहो तेथें
त्यांच्या भाऊबंदांकडे पोहंचतें केलें; आणि मग ते
शोमरोनास परत गेले.

१६ त्या समयीं आहाज राजानें अश्शूरच्या राजाकडे
जासूद पाठवून कुमक मागितली. १७ कारण अदोमी
लोकांनीं पुनः येऊन यहूदास मार देऊन कांहीं लोक
पाडाव करून नेले होते. १८ आणि पलिष्टी लोक तळ-
वट व यहूदाचा दक्षिण प्रांत यांतील नगरांवर स्वारी
करून बेथ-शेमेश, अयालोन, गदेरोथ, सोखो व त्याच्या
आसपासचीं खेडींपाडीं, तिम्ना व त्याच्या आसपासचीं
खेडींपाडीं, आणि गिम्जो व त्याच्या आसपासचीं खेडीं-
पाडीं हीं सर्व काबीज करून त्यांत राहूं लागले.
१९ इस्राएलाचा राजा आहाज याच्यामुळें परमेश्वरानें
यहूदास धुळीस मिळविलें, कारण त्यानें बेफाम वर्तन
करून परमेश्वराचा मोठा अपराध केला होता. २० यामुळें
अश्शूरचा राजा तिल्गथ-पिल्नेसर यानें त्याजकडे
येऊन त्यास त्रस्त केलें; त्यास साहाय्य केलें नाहीं.
२१ आहाजानें परमेश्वराच्या मंदिरांतून आणि राजाच्या व
सरदारांच्या घरांतून धन घेऊन अश्शूरच्या राजाला दिलें
तरी त्याचा त्याला कांहीं उपयोग झाला नाहीं. २२ संकट-
समयीं या आहाज राजानें परमेश्वराचा अधिकच
अपराध केला; २३ दिमिष्काच्या ज्या दैवतांनीं त्यास मार
दिला होता, त्यांस त्यानें यज्ञ केले. तो म्हणाला, अरामी
राजांस त्यांच्या दैवतांनीं साहाय्य केलें तर मी त्यांस यज्ञ
केल्यास मलाहि ते साहाय्य करितील; पण ते त्याच्या व
सर्व इस्राएलाच्या नाशास कारण झाले. २४ आहाजानें
देवाच्या मंदिरांतील पात्रें जमा करून तीं फोडून-
तोडून टाकिलीं; त्यानें परमेश्वराच्या मंदिराचीं द्वारें बंद
केलीं आणि यरुशलेमाच्या कोनाकोपऱ्यांतून वेद्या
बांधिल्या, २५ त्यानें यहूदाच्या प्रत्येक नगरांत अन्य
दैवतांस धूप जाळण्यासाठीं उच्च स्थानें बांधिलीं आणि
आपल्या पूर्वजांचा देव परमेश्वर यांस संतप्त केलें.
२६ अथपासून इतिपर्यंत त्याचीं बाकीचीं कृत्यें व त्याचें
सर्व वर्तन हीं यहूदा व इस्राएल यांच्या राजांच्या बखरींत
वर्णिलीं आहेत. २७ आहाज आपल्या पितरांजवळ
जाऊन निजला; त्यास यरुशलेम नगरांत मूठमाती
दिली; पण त्यास इस्राएलाच्या राजांच्या कबरस्तानांत
नेलें नाहीं; मग त्याचा पुत्र हिज्कीया हा त्याच्या जागीं
राजा झाला.

२९ १ हिज्कीया राज्य करूं लागला तेव्हां तो
पंचवीस वर्षांचा होता; त्यानें एकुणतीस वर्षें
यरुशलेमांत राज्य केलें; त्याच्या आईचें नांव

अबीया, ती जखऱ्याची कन्या. २ आपला पूर्वज दावीद
याच्याप्रमाणें परमेश्वराच्या दृष्टीनें जें नीट तें तो करीत
असे. ३ त्याच्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षाच्या पहिल्या
महिन्यांत त्यानें परमेश्वराच्या मंदिराचे दरवाजे उघडिले
आणि त्यांची दुरुस्ती केली. ४ मग त्यानें याजकांस व
लेव्यांस आणून पूर्वेकडील चौकांत जमा केलें; ५ तो
त्यांस म्हणाला, लेव्यांनो, माझें ऐका, तुम्ही स्वतः पवित्र
व्हा आणि तुमच्या पूर्वजांचा देव परमेश्वर याचें मंदिर
पवित्र करा; पवित्रस्थानांतून सर्व अमंगळता दूर करा;
६ आमच्या पूर्वजांनीं अपराध करून आपला देव
परमेश्वर याच्या दृष्टीनें जें वाईट तें केलें व त्यास
सोडून दिलें; परमेश्वराच्या निवासास ते पराङ्मुख झाले;
त्यांनीं त्याजकडे आपली पाठ फिरविली; ७ त्याप्रमाणेंच
त्यांनीं देवडीचे दरवाजे बंद केले, दीप मालविले आणि
पवित्रस्थानांत इस्राएलाच्या देवाप्रीत्यर्थ धूप जाळिला
नाहीं की होमबलि अर्पिले नाहींत; ८ म्हणून परमे-
श्वराचा कोप यहूदा व यरुशलेम यांवर भडकला;
त्यानें त्यांना दहशत व विस्मय यांस कारण केलें आहे,
व ते धिक्कारास पात्र झाले आहेत हें तुम्ही डोळ्यांनीं
पाहत आहां. ९ यामुळें आमच्या वाडवडिलांचा तरवारीनें
वध झाला; आमचे पुत्र, कन्या व स्त्रिया पाडाव होऊन
गेल्या; १० आतां माझ्या मनांत आहे कीं इस्राएलाचा
देव परमेश्वर याच्याशीं आपण करार करावा, म्हणजे
त्याचा आम्हांवरील संताप दूर होईल. ११ मुलांनो,
आतां हयगय करूं नका, कारण तुम्हीं परमेश्वरासमोर
उभें राहावें, त्याची सेवाचाकरी करावी व त्याचे सेवक
होऊन धूप जाळावा म्हणून परमेश्वरानें तुम्हांस
निवडिलें आहे.

१२ मग लेवी उठून उभे राहिले ते हे: कहाथी
वंशांतले महथ बिन अमासय व योएल बिन अजऱ्या;
मरारी वंशांतले कीश बिन अब्दी व अजऱ्या बिन
यहलेलेल; गेर्षोनी वंशांतले यवाह बिन जिम्मा,
आणि एदेन बिन यवाह; १३ अलीसाफानाच्या
वंशांतले शिम्री व ईयेल; आसाफाच्या वंशांतले
जखऱ्या व मतन्या; १४ हेमान वंशांतले यहीएल व
शिमी; यदूथूनाच्या वंशांतले शमाया व उज्जियेल.
१५ त्यांनीं आपल्या भाऊबंदांस एकत्र जमवून स्वतांस
पवित्र केलें, आणि परमेश्वराच्या वचनानुसार राजानें
आज्ञा केली होती तीप्रमाणें परमेश्वराच्या मंदिराच्या
शुद्धीसाठीं ते मंदिरांत गेले. १६ याजक परमेश्वराच्या
मंदिराचा गाभारा शुद्ध करण्याकरितां त्यांत गेले. आंत
जाऊन परमेश्वराच्या मंदिरांत जेवढ्या अशुद्ध वस्तु
त्यांस सांपडल्या तेवढ्या सर्व बाहेर काढून परमेश्वराच्या
मंदिराच्या अंगणांत त्यांनीं नेल्या. लेव्यांनीं त्या उचलून
बाहेर नेऊन किद्रोन ओहळांत टाकिल्या. १७ पहिल्या
महिन्याच्या प्रतिपदेस त्यांनीं पवित्रीकरणास आरंभ
केला व त्याच महिन्याच्या अष्टमीस ते परमेश्वराच्या
देवडीपर्यंत आले; त्यांनीं परमेश्वराचें मंदिर आठ
दिवसांत पवित्र केलें; पहिल्या महिन्याच्या सोळाव्या
दिवशीं सर्व काम त्यांनीं समाप्त केलें. १८ मग ते
राजमंदिरीं हिज्कीया राजाकडे जाऊन त्यास म्हणाले,
आम्हीं परमेश्वराचें सर्व मंदिर, होमवेदी व तिचीं सर्व
उपकरणें आणि समर्पित भाकरीचें मेज व त्याचीं सर्व
उपकरणें शुद्ध केलीं आहेत. १९ जेवढीं पात्रें आहाज
राजानें आपल्या कारकीर्दीत अत्याचार करून फेकून
दिलीं होतीं, तेवढीं सर्व आम्हीं नीट करून पवित्र
केलीं आहेत; पाहा, तीं परमेश्वराच्या वेदीपुढें आहेत.
२० मग हिज्कीया राजा सकाळीं उठून नगराचे
सर्व सरदार एकवट करून परमेश्वराच्या मंदिरीं गेला.
२१ तेव्हां राज्य, पवित्रस्थान व यहूदा यांच्याकरितां
त्यांनीं सात गोऱ्हे, सात एडके, सात कोकरें व सात
बोकड पापार्पणासाठीं आणिले. मग ते परमेश्वराच्या
वेदीवर अर्पावे अशी अहरोन वंशांतील याजकांस
त्यानें आज्ञा केली. २२ मग त्यांनीं ते गोऱ्हे कापिले
आणि याजकांनीं त्यांचें रक्त घेऊन वेदीवर शिंपडिलें.
त्यांनीं मेंढरें मारून त्यांचेंहि रक्त वेदीवर शिंपडिलें;
त्याप्रमाणेंच कोकरेंहि मारून त्यांचें रक्त वेदीवर
शिंपडिलें. २३ मग त्यांनीं पापार्पणाचे बकरे राजाच्या
व मंडळीच्यासमोर आणिले; त्यांवर त्यांनीं आपले
हात ठेविले; २४ मग याजकांनीं ते कापून इस्राएला-

बद्दल प्रायश्चित्त व्हावयासाठीं त्यांचें रक्त पापबलि
म्हणून वेदीवर शिंपडिलें; सर्व इस्राएलांसाठीं होमार्पण
व पापार्पण करावें अशी राजाज्ञा झाली. २५ दावीद व
राजाचा द्रष्टा गाद आणि नाथान संदेष्टा यांच्या आज्ञे-
प्रमाणें झांजा, सारंग्या व वीणा वाजविण्यासाठीं लेव्यांस
परमेश्वराच्या मंदिरांत उभें केलें; ही आज्ञा परमेश्वरानें
आपल्या संदेष्ट्यांच्या द्वारें केली होती. २६ दाविदानें
करविलेलीं वाद्यें घेऊन लेवी उभे राहिले व याजक
करणे घेऊन उभे राहिले. २७ मग हिज्कीयानें वेदीवर
होमबलि अर्पिण्याची आज्ञा दिली. होमार्पणास
आरंभ झाला तेव्हां परमेश्वराच्या स्तोत्रासहि आरंभ
झाला, आणि करणे व इस्राएलांचा राजा दावीद
यानें करविलेलीं वाद्यें वाजूं लागलीं. २८ सर्व मंडळी
आराधना करूं लागली, गायक गाऊं लागले व करणेकरी
करणे वाजवूं लागले; होमार्पणाची समाप्ति होईपर्यंत
हें सर्व चाललें होतें. २९ यज्ञाची समाप्ति झाली
तेव्हां राजानें व त्याजबरोबरच्या सर्व लोकांनीं
नमन करून आराधना केली. ३० मग हिज्कीया राजा
व सरदार यांनीं लेव्यांस आज्ञा केली कीं दावीद व
आसाफ द्रष्टा यांचीं कवनें गाऊन परमेश्वराची स्तुति
करा. तेव्हां त्यांनीं आनंदानें स्तुति केली व आपलीं
मस्तकें लववून आराधना केली. ३१ मग हिज्कीया
म्हणाला, आतां तुम्हीं आपणांस परमेश्वराला समर्पण
केलें आहे तर जवळ येऊन परमेश्वराच्या मंदिरांत
यज्ञ व उपकारस्मरणाचीं अर्पणें आणा. तेव्हां मंडळीनें
यज्ञ व उपकारस्मरणाचीं अर्पणें आणिलीं आणि जे उदार
मनाचे होते त्यांनीं होमार्पणें आणिलीं. ३२ मंडळींतील
लोकांनीं यज्ञपशु आणिले त्यांची संख्या सत्तर बैल,
शंभर मेंढे व दोनशें कोकरें एवढी होती; हीं
सर्व परमेश्वराप्रीत्यर्थ होमार्पणासाठीं होतीं. ३३ सहाशें
बैल व तीन हजार शेरडेंमेंढरें एवढे वाहिलेले पशु होते;
३४ पण याजकांची संख्या फार थोडी असल्यामुळें त्या
सर्व होमबलींचीं कातडीं काढितां येईनात म्हणून काम
समाप्त होईपर्यंत व याजक आपणांस पवित्र करीपर्यंत
त्यांचे बांधव लेवी यांनीं त्यांस मदत केली; कारण
आपणांस पवित्र करण्याच्या कामीं याजकांपेक्षां लेवी
विशेष सात्विक मनाचे होते. ३५ होमबलि पुष्कळ होते
आणि शांत्यर्पणांच्या पशूंची वपाहि पुष्कळ होती;
प्रत्येक होमबलीबरोबर त्यांनीं पेयार्पणेंहि दिलीं. या
प्रकारें परमेश्वराच्या मंदिरांतील उपासना व्यवस्थितपणें
स्थापिण्यांत आली. ३६ तेव्हां हिज्कीया व सर्व प्रजा
आनंदित झाली, कारण देवानें आपल्या लोकांसाठीं
या सर्व गोष्टींची सिद्धता केली होती; हें अचानक
घडून आलें.

३० १ हिज्कीयानें सर्व इस्राएल व यहूदा यांस
आणि एफ्राईम व मनश्शे यांसहि पत्रें लिहून
कळविलें कीं तुम्ही यरुशलेमांत परमेश्वराच्या
मंदिरीं इस्राएलाचा देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ
वल्हांडण सण पाळावयास या. २ राजा, त्याचे सरदार
आणि यरुशलेमांतील सर्व मंडळी यांनीं विचार करून
असें ठरविलें होतें कीं वल्हांडण सण दुसऱ्या महिन्यांत
पाळावा. ३ त्यांस तो त्या समयीं पाळितां आला नाहीं,
कारण थोड्याच याजकांनीं आपणांस पवित्र केलें होतें
व लोकहि यरुशलेमांत जमले नव्हते. ४ ही गोष्ट राजास
व सगळ्या जनसमुदायास पसंत वाटली. ५ लोकांनीं
इस्राएलाचा देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ यरुशलेमास
येऊन वल्हांडण सण पाळावा असा डांगोरा बैर-शेब्या-
पासून दानापर्यंत सर्व इस्राएलांत पिटवावा असा त्यांनीं
ठराव केला; या प्रकारें एवढ्या मोठ्या समुदायानें हा सण
शास्त्रांत लिहिल्याप्रमाणें पाळिला नव्हता. ६ मग राजा
व त्याचे सरदार यांच्याकडून पत्रें घेऊन जासूद राजाज्ञे-
प्रमाणें सर्व यहूदा प्रांतांत फिरले; ते लोकांस सांगत
गेले कीं इस्राएल लोकहो, अब्राहाम, इसहाक व इस्राएल
यांचा देव जो परमेश्वर त्याच्याकडे वळा म्हणजे अश्शूरी
राजाच्या हातून वांचून जे लोक अवशिष्ट राहिले आहेत
त्यांच्याकडे तो वळेल. ७ तुम्ही आपल्या वाडवडिलां-
प्रमाणें व आपल्या भाऊबंदांप्रमाणें होऊं नका; त्यांनीं
आपल्या पूर्वजांचा देव परमेश्वर याचा अपराध केल्यामुळें
त्यानें त्यांची दुर्दशा केली हें तुम्हांस दिसतच आहे.
८ तुम्ही आपल्या पूर्वजांप्रमाणें ताठ मानेचे होऊं नका,

तर परमेश्वरापाशीं आणभाक करून जें पवित्रस्थान त्यानें
कायमचें पवित्र केलें आहे, त्याजवळ या आणि तुमचा
देव परमेश्वर याची उपासना करून त्याच्या भडकलेल्या
कोपाचें निवारण करा. ९ तुम्ही आतां परमेश्वराकडे
वळलां तर ज्यांनीं तुमचे भाऊबंद व तुमचीं मुलें
पाडाव करून नेलीं आहेत ते त्यांजवर दया करितील,
व तीं या देशीं परत येतील, कारण तुमचा देव परमे-
श्वर कृपाळू व दयाळू आहे, आणि तुम्ही त्याच्याकडे
वळलां तर तो आपलें मुख तुमच्याकडून फिरविणार
नाहीं. १० या प्रकारें एफ्राईम व मनश्शे या प्रांतांतील
नगरानगरांतून फिरत जासूद जबुलूनापर्यंत गेले, पण
लोकांनीं त्यांची टर उडवून फटफजिती केली. ११ तरी
आशेर, मनश्शे व जबुलून यांतले कांहीं लोक नम्र
होऊन यरुशलेमास आले; १२ आणि यहूदाला देवाचा
असा वरदहस्त प्राप्त झाला कीं राजानें व सरदारांनीं
परमेश्वराच्या वचनानुसार जी आज्ञा केली ती पाळण्यास
ते एकचित्तानें तत्पर झाले. १३ दुसऱ्या महिन्यांत
बेखमीर भाकरीचा सण पाळण्यास पुष्कळ लोकांचा मोठा
समुदाय यरुशलेमांत जमा झाला. १४ त्यांनीं उठून
यरुशलेमांतील सर्व वेद्या व धूप जाळण्याच्या सर्व वेद्या
काढून किद्रोन नाल्यांत फेकून दिल्या. १५ त्यांनीं
दुसऱ्या महिन्याच्या चतुर्दशीस वल्हांडणपशु मारिले;
तेव्हां याजक व लेवी लज्जित झाले व त्यांनीं आपणांस
पवित्र करून होमबलि परमेश्वराच्या मंदिरीं आणिले.
१६ देवाचा माणूस मोशे याच्या नियमशास्त्रानुसार
आपल्या क्रमाप्रमाणें ते आपल्या ठिकाणीं उभे
राहिले; त्यांनीं लेव्यांच्या हातून रक्त घेऊन शिंपडिलें.
१७ ज्यांनीं आपणांस पवित्र केलें नव्हतें असे पुष्कळ
लोक त्या मंडळींत होते म्हणून सर्व अशुद्ध लोकां-
प्रीत्यर्थ वल्हांडणाचे यज्ञपशु अर्पून परमेश्वराकरितां
पवित्र करण्याचें काम लेव्यांस सांगितलें. १८ बहुत
लोकांनीं, म्हणजे एफ्राईम, मनश्शे, इस्साखार व जबुलून
यांतल्या पुष्कळांनीं आपणांस शुद्ध केलें नव्हतें तरी
ते वल्हांडणाच्या पशूंचें मांस शास्त्रलेखाविरुद्ध खात
होते, कारण हिज्कीयानें त्यांच्याप्रीत्यर्थ प्रार्थना केली
कीं १९ जे कोणी आपल्या पूर्वजांचा देव परमेश्वर
याच्या चरणीं लागले आहेत ते पवित्रस्थानाच्या विधी-
प्रमाणें शुद्ध नसले तरी त्या सर्वांच्या पापाची तो दयाळू
परमेश्वर क्षमा करो. २० हिज्कीयाची ही प्रार्थना ऐकून
परमेश्वरानें लोकांस क्षमा केली. २१ जे इस्राएल लोक
यरुशलेमांत हजर होते त्यांनीं सात दिवसपर्यंत बेखमीर
भाकरीचा सण मोठ्या आनंदानें पाळिला आणि
प्रतिदिनीं लेवी व याजक परमेश्वराप्रीत्यर्थ महानादाचीं
वाद्यें वाजवून परमेश्वराची स्तुति करीत होते. २२ जे
लेवी परमेश्वराच्या सेवेंत प्रवीण होते, त्या सर्वांस
हिज्कीयानें आश्वासन दिलें. या प्रकारें शांत्यर्पणें करीत
व आपल्या वाडवडिलांचा देव परमेश्वर याचा धन्यवाद
करीत त्या पर्वाचे सात दिवस ते उत्सव करीत राहिले.
२३ मग सर्व मंडळीनें असा विचार केला कीं आणखी
सात दिवस उत्सव करावा, आणि याप्रमाणें त्यांनीं
आणखी सात दिवस आनंदानें पाळिले. २४ यहूदाचा
राजा हिज्कीया यानें अर्पणासाठीं मंडळीस एक हजार
गोऱ्हे आणि सात हजार मेंढेबकरे दिले; आणि सरदारांनीं
मंडळीस एक हजार गोऱ्हे व दहा हजार मेंढेबकरे दिले;
त्या समयीं पुष्कळ याजकांनीं आपणांस पवित्र केलें.
२५ तेव्हां याजक व लेवी यांसह यहूदाची सारी मंडळी
आणि इस्राएलांतून आलेले लोक व इस्राएलांतून आलेले
व यहूदांत राहणारे परदेशीय या सर्वांनीं उत्सव केला.
२६ यरुशलेमांत फार आनंद झाला; इस्राएलाचा राजा
दावीदपुत्र शलमोन याच्या वेळेपासून असा उत्सव
यरुशलेमांत कधीं झाला नव्हता. २७ मग लेवीय
याजकांनीं उभे राहून लोकांस आशीर्वाद दिले; त्यांची
वाणी देवानें ऐकली, आणि त्यांची प्रार्थना देवाच्या
पवित्र निवासापर्यंत, स्वर्गापर्यंत, जाऊन पोहंचली.

३१ १ हें सर्व आटोपल्यावर तेथें हजर असलेल्या
सर्व इस्राएलांनीं यहूदाच्या नगरानगरांतून
जाऊन यहूदा, बन्यामीन, एफ्राईम व मनश्शे या
प्रांतांत असलेले मूर्तिस्तंभ मोडून टाकिले, अशेरा मूर्ति
फोडून टाकिल्या आणि उच्च स्थानें व वेद्या मोडून फोडून
टाकिल्या; त्यांचा सर्वस्वीं विध्वंस केला. मग सर्व

इस्राएल लोक आपआपल्या गांवीं आपआपल्या
वतनांत गेले. २ परमेश्वराच्या छावणीच्या द्वारांत
होमबलि व शांत्यर्पणें करणें, सेवाचाकरी करणें,
उपकारस्तुति व स्तवन करणें या सर्वांसाठीं हिज्कीयानें
याजकांचे व लेव्यांचे त्यांच्या त्यांच्या सेवेप्रमाणें क्रम-
वार वर्ग नेमिले. ३ मग त्यानें आपल्या संपत्तींतून
होमार्पणासाठीं राजभाग ठरविला; परमेश्वराच्या नियम-
शास्त्रांत लिहिलें आहे त्याप्रमाणें नित्य सकाळचीं व
संध्याकाळचीं होमार्पणें, शब्बाथ, चंद्रदर्शनें व नियतपर्वें
यांच्या होमबलींसाठीं त्यानें राजभाग ठरविला. ४ परमे-
श्वराच्या नियमशास्त्रानुसार याजक व लेवी यांना मना-
पासून आपलीं कामें करितां यावीं म्हणून त्यांचा भाग
त्यांस द्यावा अशी आज्ञा त्यानें यरुशलेमांत राहणाऱ्या
लोकांस केली. ५ ही आज्ञा कानीं पडतांच इस्राएल
लोक धान्य, द्राक्षारस, तेल, मध आदिकरून भूमीचा
प्रथम उपज आणि सगळ्या उत्पन्नाचा दशमांश सढळ
हातानें देऊं लागले. ६ जे इस्राएल व यहूदी यहूदाच्या
नगरांत राहत असत त्यांनीं बैल व शेरडेंमेंढरें यांचा
दशमांश आणि त्यांचा देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ
समर्पिलेल्या पवित्र वस्तूंचा दशमांश आणून त्यांच्या राशी
केल्या. ७ राशी घालण्याचें त्यानें तिसऱ्या महिन्यांत
आरंभून सातव्या महिन्यांत संपविलें. ८ हिज्कीया
व सरदार यांनीं येऊन त्या राशी पाहिल्या तेव्हां ते
परमेश्वराचा व त्याचे लोक इस्राएल यांचा धन्यवाद
करूं लागले. ९ हिज्कीयानें याजक व लेवी यांस त्या
राशींविषयीं विचारिलें. १० तेव्हां सादोक घराण्यांतला
अजऱ्या मुख्य याजक त्यास म्हणाला, लोक परमेश्वरा-
च्या मंदिरांत अर्पणें आणूं लागले तेव्हांपासून आम्हांस
पोटभर खावयास मिळून पुष्कळ शिल्लकाहे राहतें;
कारण परमेश्वरानें आपल्या लोकांचें कल्याण केलें
आहे; जें शिल्लक राहिलें आहे त्याची ही मोठी रास
आहे. ११ मग हिज्कीयानें परमेश्वराच्या मंदिरांत
खोल्या बांधण्याची आज्ञा केली व त्याप्रमाणें त्या
बांधिल्या. १२ लोक अर्पणें, दशमांश व वाहिलेल्या वस्तु
प्रामाणिकपणें आणून पोंचवूं लागले; त्यांचा मुख्य
अधिकारी कोनन्या नांवाचा एक लेवी असून त्याचा
दुय्यम, त्याचा भाऊ शिमी हा होता. १३ कोनन्या व
त्याचा भाऊ शिमी यांच्या हाताखालीं यहीएल, अजज्या,
नहथ, असाएल, यरीमोथ, योजाबाद, अलीएल,
इस्मख्या, महथ व बनाया हे हिज्कीया राजा व
देवाच्या मंदिराचा अधिकारी अजऱ्या यांच्या आज्ञेनें
कारभारी नेमिले. १४ परमेश्वरास केलेलीं अर्पणें व परम-
पवित्र वस्तु यांची वांटणी करितां यावी म्हणून इम्रा
लेवी याचा पुत्र कोरे जो पूर्वेच्या द्वाराचा द्वारपाल होता
त्यास स्वेच्छार्पणांची देखरेख करण्यासाठीं नेमिलें होतें.
१५ त्याच्या हाताखालीं एदेन, मिन्यामीन, येशूवा,
शमाया, अमऱ्या व शखन्या हे होते; ते याजकांच्या
नगरांत राहत असत; त्यांच्या सर्व भाऊबंदांस, मग
ते लहान असोत कीं मोठे असोत, त्यांच्या त्यांच्या
क्रमानुसार प्रामाणिकपणें वांटणी करून देण्यासाठीं
त्यांस नेमिलें होतें. १६ तसेंच पुरुषांच्या वंशावळींत
नोंदिलेले जे पुरुष तीन वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे
असून प्रत्येक दिवसाच्या कामासाठीं परमेश्वराच्या
मंदिरांत जात असत त्यांच्या त्यांच्या क्रमानुसार जी
त्यांची सेवा असे तीप्रमाणें त्यांस वांटणी देत असत.
१७ त्याप्रमाणें ज्या याजकांची, त्यांच्या पितृकुळां-
प्रमाणें वंशावळींत नोंद झाली होती त्यांस आणि
जे लेवी वीस वर्षांचे व त्याहून अधिक वयाचे असून
आपआपल्या क्रमानुसार काम करीत असत त्यांसहि
वांटणी देत असत. १८ शिवाय वंशावळींत नोंदिलेल्या
मुलांबाळांस, स्त्रियांस, पुत्रांस व कन्यांस अशा सर्व
समुदायास वांटणी देत असत, कारण ते आपणांस
प्रामाणिकपणानें पवित्र करीत असत. १९ त्याप्रमाणें
जे अहरोनवंशांतले याजक त्यांच्या प्रत्येक नगरांत व
शिवारांत राहत असत त्या सर्व याजक पुरुषांस
आणि लेव्यांपैकीं ज्यांची वंशावळींत नोंद झाली होती
त्यांसहि वांटणी देण्यासाठीं मनुष्य नेमिले होते.
२० हिज्कीयानें या प्रकारें सर्व यहूदांत हाच नियम
लावून दिला; त्याचा देव परमेश्वर याच्या दृष्टीनें जें
कांहीं बरें, योग्य व खरें तें तो करी. २१ देवाच्या

मंदिरांतील उपासना, धर्मव्यवस्था व आज्ञा यांच्या-
संबंधानें जें काम त्यानें आपल्या देवाच्या भजनीं
लागून आरंभिलें तें त्यानें पूर्ण मनोभावें केलें व त्यांत
त्याला यश आलें.

३२ १ या गोष्टी घडल्यावर व अशी निष्ठा
प्रगट झाल्यावर अश्शूरचा राजा सन्हेरीब यानें
येऊन यहूदांत प्रवेश केला आणि तटबंदी नगरें
जिंकून घ्यावयाच्या हेतूनें त्यानें त्यांसमोर तळ दिला.
२ सन्हेरीब आला असून यरुशलेमाशीं लढण्याचा
त्याचा मानस आहे असें हिज्कीयानें पाहिलें, ३ तेव्हां
त्यानें आपले सरदार व योद्धे यांची मसलत घेऊन
नगराबाहेरील पाण्याचे झरे बंद केले व ह्या कामीं
त्यांनीं त्याला साहाय्य केलें. ४ पुष्कळ लोक जमा
होऊन त्यांनीं सर्व झरे बंद केले व देशामधून
वाहणारा ओहोळहि झाकून टाकिला; ते म्हणाले,
अश्शूरचा राजा आल्यास त्यास मुबलक पाणी कां मिळूं
द्यावें? ५ कोट मोडून पडला होता तो हिज्कीयानें
हिंमत करून पुन: बांधून काढिला व त्यावरील बुरूज
उंच केले आणि त्याच्या बाहेरचा दुसरा कोट त्यानें
मजबूत केला, दावीदपुरांतल्या मिल्लो नांवाच्या
बुरुजाची मजबुती केली आणि शस्त्रें व ढाली मुबलक
बनविल्या. ६ त्यानें प्रजेवर सेनापति नेमून त्यांस
नगराच्या वेशीच्या चौकांत आपल्यापाशीं एकवट केलें
व त्यांस धीर देण्यासाठीं तो त्यांस म्हणाला, ७ दृढ
व्हा, हिंमत धरा, अश्शूरचा राजा व त्याजबरोबरचा
मोठा समुदाय पाहून घाबरूं नका, कचरूं नका;
त्याच्यापेक्षां आमच्या पक्षाचा जो आहे तो मोठा
आहे. ८ मांसमय भुजांचा त्यांस आधार आहे, पण
आम्हांस मदत करावयास व आमच्या लढाया लढाव-
यास आमचा देव परमेश्वर आम्हांबरोबर आहे.
यहूदाचा राजा हिज्कीया याच्या ह्या बोलण्यावर सर्व
प्रजेनें भरंवसा ठेविला.

९ यानंतर अश्शूरचा राजा सन्हेरीब हा आपल्या
सर्व सैन्यासह लाखीशासमोर तळ देऊन राहिला होता,
त्यानें आपले सेवक हिज्कीया राजाकडे व यरुशलेमांत
असलेल्या यहूद्यांकडे पाठविले व त्यांस निरोप
कळविला कीं १० अश्शूरचा राजा सन्हेरीब म्हणतो,
यरुशलेम घेरिलें असतां तुम्ही त्यांत बसून राहिलां
आहां, तर तुमची भिस्त कशावर आहे? ११ आमचा
देव परमेश्वर आम्हांस अश्शूरच्या राजाच्या हातांतून
सोडवील असें सांगून हिज्कीया तुम्हांस भ्रमांत
घालून तहानेनें व भुकेनें मारीत आहे ना? १२ त्या
देवाचीं उच्च स्थानें व वेद्या काढून टाकून यहूदा व
यरुशलेम यांस ह्याच हिज्कीयानें आज्ञा दिली कीं तुम्हीं
एकाच वेदीपुढें आराधना करावी व तीवरच धूप
जाळावा, हें खरें ना? १३ मीं व माझ्या वडिलांनीं
देशोदेशींच्या सर्व लोकांचें काय केलें हें तुम्हांस ठाऊक
नाहीं काय? आपला देश माझ्या हातून सोडविण्यास
देशोदेशींच्या राष्ट्रांचे देव कोणी समर्थ झाले काय?
१४ माझ्या वाडवडिलांनीं ज्या राष्ट्रांचा सर्वस्वी
संहार केला त्यांच्या सर्व देवांपैकीं आपल्या लोकांस
माझ्या हातांतून बचावणारा असा कोणी देव होता
काय? तर तुमचा देव तुम्हांस माझ्या हातांतून कसा
सोडवील? १५ यास्तव तुम्ही हिज्कीयास असें भुलवूं
व बहकवूं देऊं नका; त्याच्यावर तुम्ही विश्वास ठेवूं
नका; माझ्या हातांतून व माझ्या वाडवडिलांच्या
हातांतून आपल्या लोकांचा बचाव करावयाची ताकद
कोणत्याहि राष्ट्राच्या किंवा राज्याच्या देवास झाली
नाहीं; तर माझ्या हातांतून तुमचा बचाव करण्याची
तुमच्या देवाला काय ताकद? १६ त्याच्या सेवकांनीं
परमेश्वर देवाची व त्याचा सेवक हिज्कीया याची
याहूनहि अधिक निंदा केली. १७ इस्राएलाचा देव
परमेश्वर याची निर्भर्त्सना करावी व त्याच्याविरुद्ध
बोलावें या हेतूनें त्यानें पत्रेंहि पाठविलीं; त्यांत त्यानें
लिहिलें कीं निरनिराळ्या देशांतील राष्ट्रांच्या देवांना
आपले लोक माझ्या हातांतून सोडवितां आले नाहींत,
त्याप्रमाणेंच हिज्कीयाच्या देवाला आपले लोक माझ्या
हातून सोडवितां यावयाचे नाहींत. १८ जे यरुशलेम-
कर कोटावर बसले होते त्यांस त्यांनीं यहूदी भाषेंत
हे शब्द उच्च स्वरानें सांगितले; हेतु हाच कीं त्यांस

यावरून त्यांची धांदल उडवावी आणि नगर हस्तगत
करावें. १९ पृथ्वीवरील मनुष्यांच्या हातांनीं
बनविलेल्या दैवतांसारखाच यरुशलेमाचा देव आहे
असें ते बोलले. २० यावरून हिज्कीया राजा आणि
संदेष्टा यशया बिन आमोज या दोघांनीं प्रार्थना केली
आणि स्वर्गाकडे पाहून धावा केला. २१ मग परमेश्वरानें
एक दूत पाठविला, त्यानें अश्शूरच्या राजाच्या छावणीं-
तील सर्व शूर वीर, प्रमुख व नायक यांचा सप्पा उड-
विला; तेव्हां तो फजीत होऊन आपल्या देशीं परत
गेला. तो आपल्या दैवतांच्या देवळांत असतां त्याच्या
पोटच्याच मुलांनीं त्यास तरवारीनें मारून टाकिलें.
२२ या प्रकारें परमेश्वरानें हिज्कीयास व यरुशलेम-
करांस अश्शूरचा राजा सन्हेरीब याच्या हातांतून व
इतर सर्वांच्या हातांतून बचाविलें, आणि तो त्यांस सर्व
बाजूंनीं मार्गदर्शक झाला. २३ पुष्कळ लोकांनीं परमे-
श्वराप्रीत्यर्थ यरुशलेमास भेटी आणिल्या आणि यहूदाचा
राजा हिज्कीया यास मोलवान् वस्तु नजर केल्या;
यापुढें तो सर्व राष्ट्रांच्या दृष्टीनें थोर झाला.

२४ त्या समयीं हिज्कीया आजारी पडून मरावयास
टेकला. त्यानें परमेश्वराची प्रार्थना केली तेव्हां त्यानें
त्याजशीं भाषण करून त्यास एक चिन्ह दिलें; २५ पण
हिज्कीयानें आपल्यावर झालेल्या उपकाराची फेड
केली नाहीं; त्याचें हृदय उन्मत्त झाल्यामुळें त्याजवर,
यहूदावर व यरुशलेमावर कोप झाला. २६ तथापि
हिज्कीया आणि यरुशलेमकर आपल्या हृदयाच्या
उन्मत्ततेविषयीं अनुताप पावून नम्र झाले, म्हणून पर-
मेश्वराचा क्रोध हिज्कीयाच्या काळांत त्यांजवर भडकला
नाहीं. २७ हिज्कीयास बहुत धन व मान मिळाला;
त्यानें सोनें, रुपें, रत्नें, सुगंधी द्रव्यें, ढाली व नाना
प्रकारचीं चांगलीं पात्रें यांसाठीं भांडागारें बनविलीं.
२८ धान्य, द्राक्षारस व तेल यांचा उपज सांठविण्या-
साठींहि त्यानें कोठारें बांधिलीं; तसेंच सर्व तऱ्हेचे
पशु व शेरडेंमेंढरें यांसाठीं तबेले व मेंढवाडे बांधिले.
२९ त्यानें नगरें वसविलीं; शेरडेंमेंढरें व गाईबैल
यांचें विपुल धन संपादिलें. परमेश्वरानें त्यास बहुत
धन दिलें. ३० याच हिज्कीयानें गीहोन गांवाचा वरला
पाट अडवून त्याचें पाणी दावीदपुराच्या पश्चिमेकडे
नीट खालीं आणिलें. हिज्कीया आपल्या सर्व कार्यांत
यशस्वी झाला. ३१ तरी पण बाबेलच्या अधिपतींनीं
देशांत घडलेल्या चमत्काराविषयीं चौकशी करावयास
वकील पाठविले, तेव्हां त्याची पारख करावी व त्याच्या
मनांत काय आहे तें जाणावें म्हणून देवानें त्यास सोडिलें.
३२ हिज्कीयाचीं बाकीचीं कृत्यें व सत्कृत्यें संदेष्टा
यशया बिन आमोज याच्या दृष्टांतग्रंथांत आणि यहूदा
व इस्राएल यांच्या राजांच्या बखरींत लिहिलीं आहेत.
३३ हिज्कीया आपल्या पितरांजवळ जाऊन निजला;
त्यांनीं त्यास दावीदवंशाच्या कबरस्तानांतील उंचवट्या-
वर मूठमाती दिली. तो मृत्यु पावल्यावर सर्व
यहूदी व यरुशलेमकर यांनीं त्याच्यासंबंधानें आदर
दर्शविला. त्याचा पुत्र मनश्शे हा त्याच्या जागीं
राजा झाला.

**३३** १ मनश्शे राज्य करूं लागला तेव्हां तो बारा
वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत पंचावन्न वर्षें
राज्य केलें. २ इस्राएल लोकांपुढून परमेश्वरानें
ज्या राष्ट्रांस घालवून दिलें होतें त्यांच्या अमंगळ
आचारांप्रमाणें परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें
मनश्शानें केलें. ३ त्याचा बाप हिज्कीया यानें उच्चस्थानें
काढून टाकिलीं होतीं तीं त्यानें पुनः बांधिलीं;
बालमूर्तींसाठीं वेद्या बांधून त्यानें अशेरा मूर्ति केल्या;
त्याप्रमाणेंच तो नक्षत्रगणांची पूजा करीत असे. ४ पर-
मेश्वरानें ज्या आपल्या मंदिराविषयीं म्हटलें होतें कीं
यरुशलेमांत माझें नाम चिरकाल राहील त्यांत त्यानें
वेद्या बांधिल्या. ५ परमेश्वराच्या मंदिराच्या दोन्ही
अंगणांत त्यानें नक्षत्रगणांसाठीं वेद्या बांधिल्या. ६ त्यानें
आपलीं मुलें हिन्नोमपुत्राच्या खोऱ्यांत अग्नींत होम
करून अर्पिलीं; तो शकुनमुहूर्त मानीत असे; जादूटोणा
व मंत्रतंत्र करीत असे आणि भूतवैद्य व चेटकी यांजशीं
संबंध ठेवीत असे; परमेश्वराच्या दृष्टीनें वाईट असें
पुष्कळ करून त्यानें त्यास संताप आणिला. ७ आपण
केलेली कोरींव मूर्ति त्यानें परमेश्वराच्या मंदिरांत ठेविली;

ज्या मंदिराविषयीं दावीद व त्याचा पुत्र शलमोन यांस
परमेश्वर म्हणाला होता कीं हें मंदिर आणि इस्राएला-
च्या सर्व वंशांतून निवडून घेतलेलें यरुशलेम यांत
मी आपलें नाम निरंतर ठेवीन; ८ मीं त्यांस ज्या
आज्ञा दिल्या होत्या आणि माझा सेवक मोशे यानें
त्यांस जें धर्मशास्त्र विहित केलें होतें तें सर्व मान्य
करून ते पाळितील तर जो देश इस्राएल लोकांच्या
पूर्वजांस दिला आहे तेथून ते भटकतील असें मी कर-
णार नाहीं. ९ मनश्शानें यहूद्यांस व यरुशलेमकरांस
एवढें बहकविलें कीं परमेश्वरानें इस्राएलांपुढून ज्या
राष्ट्रांचा नाश केला होता त्यांच्याहूनहि अधिक दुराचार
त्यांनीं केला. १० परमेश्वरानें मनश्शे व त्याचे लोक
यांची कानउघाडणी केली, पण त्यांनीं पर्वा केली नाहीं.
११ यास्तव परमेश्वरानें त्यांजवर अश्शूरच्या राजाचे
सेनानायक पाठविले; त्यांनीं मनश्शास आंकड्यांनीं
पकडून व बेड्या घालून बाबेलास नेलें. १२ तो
संकटांत पडला तेव्हां तो आपला देव परमेश्वर यास
शरण गेला आणि आपल्या पूर्वजांच्या देवासमोर
फार दीन झाला. १३ त्यानें त्याची प्रार्थना केली,
त्याचा धावा केला, तेव्हां त्यानें त्याची विनंति ऐकून
त्यास पुन: यरुशलेमांत आणून त्याचें राज्य त्यास दिलें.
तेव्हां परमेश्वरच देव आहे असें मनश्शास कळून आलें.

१४ यानंतर त्यानें दावीदपुराच्या बाहेर गीहोन-
च्या पश्चिमेस खोऱ्यांत मासळीदरवाजापर्यंत एक
कोट बांधिला, ओफेलभोंवतीं कोट बांधून तो उंच
केला आणि यहूदाच्या सर्व तटबंदी नगरांत त्यानें
सेनानायक ठेविले. १५ मग त्यानें अन्य देव व मूर्ति
परमेश्वराच्या मंदिरांतून काढून आणि परमेश्वराच्या
मंदिराच्या पर्वतावर व यरुशलेमांत केलेल्या सर्व वेद्या
काढून नगराबाहेर फेकून दिल्या. १६ त्यानें परमे-
श्वराच्या वेदीचा जीर्णोद्धार केला व तीवर शांत्यर्पणें
व उपकारस्मरणाचे बलि अर्पिले आणि इस्राएलाचा
देव परमेश्वर याची उपासना करण्याची यहूदास आज्ञा
केली. १७ तरी इस्राएल लोक अजूनहि उच्च स्थानीं
यज्ञ करीतच असत; मात्र ते आपला देव परमेश्वर
यासाठीच ते करीत. १८ मनश्शाचीं बाकीचीं कृत्यें, त्यानें
आपल्या देवास केलेली प्रार्थना आणि इस्राएलाचा
देव परमेश्वर याच्या नामानें त्याजशीं जे द्रष्टे बोलले
त्यांचीं वचनें हीं सर्व इस्राएलाच्या राजांच्या बखरींत
लिहिलीं आहेत. १९ त्यानें केलेली प्रार्थना, ती
कशी मान्य झाली तें, त्याचें सर्व पाप व अपराध,
तो दीन होण्यापूर्वी त्यानें उच्च स्थानें कोठेंकोठें बांधिलीं
तें आणि अशेरा मूर्ति व कोरींव मूर्ति त्यानें कशा उभा-
रिल्या तें सर्व द्रष्ट्यांच्या[1] बखरींत लिहिलें आहे.
२० मनश्शे आपल्या पितरांजवळ जाऊन निजला;
त्यांनीं त्यास त्याच्याच घरांत मूठमाती दिली; त्याच्या
जागीं त्याचा पुत्र आमोन राजा झाला.

२१ आमोन राज्य करूं लागला तेव्हां तो बावीस
वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत दोन वर्षें राज्य केलें.
२२ त्यानें आपला बाप मनश्शे याच्या करणीप्रमाणें परमे-
श्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें केलें; त्याचा बाप मनश्शे
यानें केलेल्या सर्व कोरींव मूर्तींपुढें आमोनानें यज्ञ
करून त्यांची उपासना केली. २३ त्याचा बाप मनश्शे
परमेश्वरापुढें जसा लीन झाला तसा तो न होतां
अधिकाधिक पाप करीत गेला. २४ त्याच्या चाकरांनीं
त्याच्याशीं फितुरी करून त्यास त्याच्याच वाड्यांत जिवें
मारिलें; २५ पण ज्यांनीं आमोन राजाशीं फितुरी केली
त्या सर्वांस देशाच्या लोकांनीं जिवें मारिलें; त्यांनीं
त्याच्या जागीं त्याचा पुत्र योशीया यास राजा केलें.

३४ १ योशीया राज्य करूं लागला तेव्हां तो
आठ वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत एकतीस
वर्षें राज्य केलें. २ परमेश्वराच्या दृष्टीनें जें बरें तें
त्यानें केलें; ज्या मार्गांनीं त्याचा पूर्वज दावीद चालला
त्यांनींच तोहि चालला, उजवीडावीकडे वळला नाहीं.
३ आपल्या कारकीर्दीच्या आठव्या वर्षी तो अल्पवयी
असतांच आपला पूर्वज दावीद याच्या देवाच्या
भजनीं लागला; बाराव्या वर्षी तो उच्च स्थानें, अशेरा-
मूर्ति आणि कोरींव व ओतींव मूर्ति यहूदा व यरु-
शलेम यांतून काढून टाकूं लागला. ४ लोकांनीं त्याच्या-

[1] पाठभेद : होजाय याच्या.

समक्ष बालमूर्तींच्या वेद्या मोडून टाकिल्या; त्यांच्या
वरल्या भागीं असलेल्या सूर्यमूर्ति त्यानें फोडून-
तोडून टाकिल्या; अशेरामूर्ति आणि कोरींव व ओतींव
मूर्ति त्यानें फोडून त्यांचें चूर्ण केलें व तें चूर्ण
जे त्यांस यज्ञ करीत असत त्यांच्या कबरांवर पसरिलें.
५ पुजाऱ्यांच्या अस्थि त्यानें त्यांच्याच वेद्यांवर
जाळून टाकिल्या; याप्रमाणें त्यानें यहूदा व यरुशलेम
हीं शुद्ध केलीं. ६ त्यानें मनश्शे, एफ्राईम, शिमोन
व नफताली येथपर्यंतच्या शहरांत व त्यांच्या सभोव-
तालच्या ओस पडलेल्या जागीं तसेंच केलें.
७ त्यानें वेद्या मोडून टाकिल्या, अशेरामूर्ति व कोरींव
मूर्ति कुटून त्यांचें चूर्ण केलें आणि इस्राएल देशांतल्या
सर्व सूर्यमूर्ति त्यानें तोडूनफोडून टाकिल्या आणि
मग तो यरुशलेमास परत आला.

८ आपल्या कारकीर्दीच्या अठराव्या वर्षी योशीयानें
देशाची व मंदिराची शुद्धि केल्यावर आपला देव
परमेश्वर याच्या मंदिराची दुरुस्ती करण्यास
शाफान बिन असल्या, नगराचा कारभारी मासेया
आणि योवाह बिन योवाहाज अखबारनवीस यांस
पाठविलें. ९ ते मुख्य याजक हिल्कीया याजकडे गेले
आणि द्वारपाळ लेवी यांनीं मनश्शे, एफ्राईम, इस्रा-
एलाचे अवशिष्ट लोक, सर्व यहूदा व बन्यामीन आणि
यरुशलेमनिवासी या सर्वांकडून जो पैसा लेव्यांनीं जमा
करून देवाच्या मंदिरांत आणिला होता तो त्यांनीं
त्याच्या स्वाधीन केला. १० त्यांनीं तो परमेश्वराच्या
मंदिराची देखरेख करणाऱ्या कामगारांच्या हातीं दिला,
आणि त्या मंदिराची जी मोडतोड झाली होती ती दुरुस्त
करण्याकडे तो त्या कामगारांनीं लाविला. ११ तासलेले
चिरे, कैच्यांसाठीं लाकूड आणि यहूदाच्या राजांनीं
मोडून टाकिलेल्या घरांसाठीं कडीपाट विकत घेण्यास
त्यांनीं तो पैसा सुतार व बांधकाम करणारे यांस दिला.
१२ त्या माणसांनीं तें काम सचोटीनें केलें; त्यांजवर
देखरेख करण्यास नेमिलेले मरारी वंशांतील लेव्यांपैकीं
यहथ व ओबद्या, आणि कहाथी वंशांतील जखऱ्या व
मशुल्लाम हे होते; गायनवादनाचें मर्म जाणणारे लेवी
हेहि होते. १३ ओझे वाहणाऱ्यांवरहि ते देखरेख
करीत आणि हरप्रकारचें काम करणाऱ्यांकडून तें काम
करून घेत; लेव्यांपैकीं कांहीं लेखक, कारभारी व द्वार-
पाल होते. १४ परमेश्वराच्या मंदिरांत आणिलेला
पैसा बाहेर आणीत असतां मोशाच्या द्वारें दिलेल्या
परमेश्वराच्या नियमशास्त्राचा ग्रंथ हिल्कीया याजकास
सांपडला. १५ हिल्कीयानें शाफान चिटणीस
यास सांगितलें कीं परमेश्वराच्या मंदिरांत मला नियम-
शास्त्राचा ग्रंथ सांपडला आहे. मग हिल्कीयानें तो
ग्रंथ शाफानास दिला. १६ शाफान तो ग्रंथ घेऊन
राजाकडे गेला आणि त्यास त्यानें अशी खबर दिली
कीं तुझ्या दासांस जें कांहीं काम सोंपलें होतें तें ते
करीत आहेत; १७ आणि परमेश्वराच्या मंदिरांत जो
पैका मिळाला तो त्यांनीं थैल्यांत भरून देखरेख कर-
णारे व कामदार यांच्या हवालीं केला आहे.
१८ शाफान चिटणिसानें राजास आणखी असें सांगितलें
कीं हिल्कीया याजकानें मला एक ग्रंथ दिला आहे.
शाफानानें तो राजास वाचून दाखविला. १९ त्या
नियमशास्त्रांतलीं वचनें राजानें ऐकलीं तेव्हां त्यानें
आपलीं वस्त्रें फाडिलीं. २० मग राजानें हिल्कीया,
अहीकाम बिन शाफान, अब्दोन बिन मीखा, शाफान
चिटणीस व राजसेवक असाया यांस आज्ञा केली कीं
२१ हा जो ग्रंथ सांपडला आहे त्यांतील मजकुरा-
संबंधानें तुम्ही जाऊन माझ्यातर्फे आणि इस्राएल
व यहूदा यांत जे शिल्लक राहिले आहेत त्यांच्यातर्फे
परमेश्वराला प्रश्न करा. या ग्रंथांत जें सर्व लिहिलें
आहे तें करण्याच्या बाबतींत आमच्या वाडवडिलांनीं
देवाची आज्ञा पाळिली नाहीं म्हणून परमेश्वरानें क्रोधाची
वृष्टि आम्हांवर केली आहे, ती फार मोटी आहे.
२२ मग हिल्कीया व राजानें आज्ञा केलेले इतर लोक
हे संदेष्ट्री हुल्दा हिच्याकडे गेले: ही शल्लूम बिन तोकहत

१ याचें नांव २ राजे २२:१२ येथें अखबोर बिन
मिखाया असें आहे.

२ याचें नांव २ राजे २२:१४ येथें तिकवा बिन
हरहस असें आहे.

बिन हस्रा नांवाचा जामदार याची स्त्री असून त्या वेळीं
यरुशलेमांत दुसऱ्या पेठेंत राहत होती; तिजकडे
जाऊन तिला त्यांनीं हें कळविलें. २३ तेव्हां ती त्यांस
म्हणाली, इस्राएलाचा देव परमेश्वर म्हणतो, ज्या
पुरुषानें तुम्हांस मजकडे पाठविलें त्यास जाऊन सांगा:
२४ परमेश्वर म्हणतो, पाहा, यहूदाच्या राजासमोर
जो ग्रंथ वाचिला त्यांत लिहिलेल्या सर्व शापांप्रमाणें मी
ह्या स्थानावर व येथील रहिवाश्यांवर अनिष्ट आणणार;
२५ कारण त्या लोकांनीं मला सोडून देऊन अन्य
देवांपुढें धूप जाळिला आहे आणि आपल्या हातांनीं
घडिलेल्या सर्व वस्तूंमुळें मला संतप्त केलें आहे म्हणून
या स्थानावर माझ्या कोपाची वृष्टि झाली आहे, तो
शांत व्हावयाचा नाहीं. २६ तथापि ज्यानें तुम्हांस
परमेश्वराला प्रश्न करावयास पाठविलें त्या यहूदाच्या
राजास जाऊन सांगा: इस्राएलाचा देव परमेश्वर
म्हणतो, हीं वचनें ऐकून २७ तुझें हृदय मृदु झालें,
तूं देवापुढें नम्र झालास, आणि या स्थानाविरुद्ध व
येथल्या रहिवाश्यांविरुद्ध मीं सांगितलें तें ऐकून तूं
दीन होऊन आपलीं वस्त्रें फाडून माझ्यासमोर रडलास,
म्हणून मीं तुझी विनंति ऐकली आहे, असें
परमेश्वर म्हणतो. २८ पाहा, मी तुला तुझ्या पितरांशीं
मिळवीन; तुला तुझ्या कबरेंत शांतीनें पोंचवितील;
जो गहजब मी या स्थळावर व येथल्या रहि-
वाश्यांवर आणणार आहें तो तूं आपल्या डोळ्यांनीं
पाहणार नाहींस. त्यांनीं परत येऊन राजाला हें कळविलें.
२९ मग राजानें यहूदांतील व यरुशलेमांतील
सर्व वडील जनांस बोलावणें पाठवून जमा केलें.
३० यहूदा येथील सर्व लोक, यरुशलेमांतले सर्व रहि-
वासी, याजक, लेवी अशा सर्व आबालवृद्धांस बरोबर
घेऊन राजा परमेश्वराच्या मंदिरीं गेला; परमेश्वराच्या
मंदिरांत सांपडलेल्या कराराच्या ग्रंथांतील सर्व वचनें
त्यानें लोकांस ऐकूं येतील अशीं वाचून दाखविलीं.
३१ मग राजानें आपल्या स्थानीं उभें राहून परमेश्वरा-
समोर असा करार केला कीं मी परमेश्वराचें अनु-
सरण करीन, त्याच्या आज्ञा, निर्बंध व नियम जिवेंभावें
पाळीन, या ग्रंथांतील कराराच्या वचनांप्रमाणें वर्तेन.
३२ मग यरुशलेमांत व बन्यामिनांत जे सर्व लोक
आढळले त्यांस त्यानें आपल्या करारांत सामील
केलें. यरुशलेमकर आपल्या वडिलांच्या देवाच्या
कराराप्रमाणें वागूं लागले. ३३ इस्राएल लोक ज्या
ज्या देशीं होते तेथून योशीयानें सर्व अमंगळ वस्तु
काढून टाकिल्या; आणि जितके इस्राएल त्यास मिळाले
तितक्या सर्वांस त्यानें त्यांचा देव परमेश्वर याची
उपासना करावयास लाविलें. त्याच्या सर्व कारकीर्दीत
त्यांनीं आपल्या वाडवडिलांचा देव परमेश्वर यास
अनुसरावयाचें सोडिलें नाहीं.

**३५** १ योशीयानें परमेश्वराप्रीत्यर्थ यरुशलेमांत
वल्हांडण सण पाळिला; पहिल्या महिन्याच्या
चतुर्दशीस वल्हांडणाचा यज्ञपशु मारिला.
२ त्यानें याजकांच्या सेवेचा क्रम लावून दिला आणि
परमेश्वराच्या मंदिरांत सेवा करण्यास त्यांस प्रोत्साहन
दिलें. ३ जे लेवी सर्व इस्राएल लोकांस शिकवीत
असत व परमेश्वराप्रीत्यर्थ पवित्र झाले होते त्यांस त्यानें
सांगितलें कीं इस्राएलाचा राजा दावीद याचा पुत्र
शलमोन यानें बांधिलेल्या मंदिरांत पवित्र कोश ठेवा;
तुम्हांस आपल्या खांद्यांवर बोजा वागविण्याची इत:पर
जरूरी नाहीं; तर आतां तुम्ही आपला देव परमेश्वर
व त्याची प्रजा इस्राएल यांची सेवा करा. ४ इस्रा-
एलाचा राजा दावीद व त्याचा पुत्र शलमोन या
दोघांनीं लिहून ठेविलेल्या विधींस अनुसरून आपल्या
पितृकुळांप्रमाणें आपआपल्या क्रमानुसार सेवा करण्यास
सिद्ध व्हा. ५ जे तुमचे भाऊबंद आहेत त्यांच्या पितृ-
कुळांच्या विभागाप्रमाणें पवित्र स्थानीं तुम्ही उभे राहा,
म्हणजे अर्थात् त्यांच्या एकेका भागाप्रीत्यर्थ लेव्यांच्या
पितृकुळांतील एकेका भागानें सेवा करावी.
६ वल्हांडणाचा यज्ञपशु मारा, आपणांस पवित्र करा
आणि मोशाच्या द्वारें सांगितलेल्या परमेश्वराच्या
वचनानुसार वागावयास आपल्या बांधवांस सिद्ध करा.
७ जे लोक तेथें हजर होते त्या सर्वांस योशीयानें
वल्हांडणाच्या यज्ञांसाठीं राजाच्या मालमत्तेंतून तीस

हजार शेरडेंमेंढरें व तीन हजार बैल दिले. ८ सरदारांनीं लोकांस, याजकांस व लेव्यांस स्वेच्छार्पणें दिलीं. देवाच्या मंदिराचे कारभारी हिल्कीया, जखऱ्या व यहीएल यांनीं वल्हांडणाच्या यज्ञांसाठीं याजकांस दोन हजार सहाशें शेरडेंमेंढरें व तीनशें बैल दिले. ९ कोनन्या व त्याचे बंधु शमाया व नथनेल, हशब्या, ईयेल व योजाबाद ह्या लेव्यांच्या प्रमुखांनीं लेव्यांस पांच हजार शेरडेंमेंढरें व पांचशें बैल वल्हांडणाच्या यज्ञांसाठीं दिले. १० या प्रकारें उपासनेची सिद्धता होऊन राजाज्ञेप्रमाणें याजक आपआपल्या स्थानीं आणि लेवी आपआपल्या क्रमानुसार उभे राहिले. ११ मग वल्हांडणाचे यज्ञपशु वधिले; बलि देणाऱ्याच्या हातून रक्त घेऊन याजक तें शिंपीत होते आणि लेवी त्या पशूंचीं कातडीं काढीत होते. १२ मोशाच्या ग्रंथांत लिहिल्याप्रमाणें परमेश्वराला अर्पावयास लोकांच्या पितृकुळांच्या विभागाप्रमाणें देतां यावीं म्हणून हीं होमार्पणें त्यांनीं निराळीं ठेविलीं. बैलांचेंहि त्यांनीं तसेंच केलें. १३ त्यांनीं वल्हांडणाच्या यज्ञपशूचें मांस विधीप्रमाणें भाजिलें आणि पवित्रार्पणें त्यांनीं बहुगुण्यांत, हंड्यांत व कढयांत शिजवून लोकांस लागलींच पोंचतीं केलीं. १४ नंतर त्यांनीं स्वत:साठीं व याजकांसाठीं तयारी केली, कारण अहरोनाचे वंशज जे याजक ते रात्र पडेपर्यंत होमबलि व वपा अर्पिण्यांत गुंतले होते म्हणून लेव्यांनीं स्वत:साठीं व अहरोन वंशज यांच्यासाठीं तयारी केली. १५ दावीद, आसाफ, हेमान आणि राजाचा द्रष्टा यदूथून यांच्या आज्ञेप्रमाणें आसाफ वंशांतले गायक आपआपल्या ठिकाणीं होते, आणि द्वारपाल प्रत्येक द्वाराजवळ होते; त्यांस आपलें काम सोडून जावें लागलें नाहीं, कारण त्यांचे भाऊबंद जे लेवी त्यांनीं त्यांच्यासाठीं तयारी केली. १६ या प्रकारें त्याच दिवशीं योशीया राजाच्या आज्ञेप्रमाणें परमेश्वराच्या सर्व उपासनेची तयारी झाली आणि वल्हांडण सण पाळण्याची व परमेश्वराच्या वेदीवर होमबलि अर्पिण्याची सिद्धता झाली. १७ त्या प्रसंगीं जे इस्राएल लोक हजर होते त्यांनीं वल्हांडण सण पाळिला आणि सात दिवस बेखमीर भाकरीचा सण पाळिला. १८ शमुवेल संदेष्ट्याच्या काळापासून या सणाप्रमाणें वल्हांडण सण इस्राएलांत केव्हांहि पाळण्यांत आला नव्हता; योशीया, याजक, लेवी, हजर असलेले सर्व यहूदी व इस्राएल लोक व यरुशलेमनिवासी यांच्याप्रमाणें पूर्वी कोणत्याहि इस्राएलाच्या राजानें वल्हांडण सण पाळिला नव्हता. १९ योशीयाच्या कारकीर्दीच्या अठराव्या वर्षीं हा वल्हांडण सण पाळण्यांत आला.

२० त्यानतर योशीयानें मंदिराची सिद्धता केल्यावर मिसरचा राजा नखो हा फरात नदीजवळील कर्कमीश नगरावर स्वारी करण्यास निघाला; तेव्हां योशीया त्याच्याशीं सामना करण्यास गेला. २१ पण त्यानें त्याजकडे आपले वकील पाठवून सांगितलें कीं यहूदाच्या राजा, मला तुजशीं काय कर्तव्य आहे? आज मी तुजवर नव्हे तर ज्या घराण्याशीं माझें वैर आहे त्यावर स्वारी करण्यास निघालों आहें; देवानें मला त्वरा करण्यास सांगितलें आहे, तर माझ्याबरोबर देव आहे, त्याच्याशीं विरोध करूं नको; त्यानें तुझा नाश करावा असें न होवो. २२ तथापि योशीया त्याजकडून आपला मोर्चा न फिरवितां त्याच्याशीं लढावयास वेशांतर करून गेला; देवाचें वचन नखोच्या द्वारें प्राप्त झालें होतें तें न जुमानितां तो मगिद्दोच्या खोऱ्यांत युद्ध करावयास आला. २३ तिरंदाजांनीं योशीया राजास बाण मारिले तेव्हां तो आपल्या सेवकांस म्हणाला, मी घायाळ झालों आहें, मला येथून घेऊन चला. २४ तेव्हां त्याच्या सेवकांनीं त्यास रथावरून उतरून त्याच्या दुसऱ्या रथावर बसविलें व यरुशलेमास नेलें; तेथें तो मृत्यु पावला व त्यांनीं त्यास त्याच्या पूर्वजांच्या कबरस्तानांत मूठमाती दिली; तेव्हां सर्व यहूदा व यरुशलेम यांनीं योशीयासाठीं शोक केला, २५ यिर्मयानें योशीयाप्रीत्यर्थ विलापगीत रचिलें; सर्व गाणारे व गाणाऱ्या आपल्या विलापगीतांत योशीयाचें वर्णन आजवर करीत आहेत; त्यांचीं हीं गीतें

इस्राएल लोकांत कायमचीं गाण्याचा ठराव करण्यांत
आला, आणि तीं विलापगीतांत नमूद केलीं आहेत.
२६ योशीयाचीं बाकीचीं कृत्यें आणि परमेश्वराच्या
नियमशास्त्रांत लिहिल्याप्रमाणें त्यानें केलेलीं सत्कृत्यें,
२७ म्हणजे अथपासून इतिपर्यंत त्याचीं सर्व
कृत्यें, इस्राएल व यहूदा यांच्या राजांच्या बखरींत
लिहिलीं आहेत.

३६ १ मग देशांतल्या लोकांनीं योशीयाचा पुत्र
यहोआहाज यास त्याच्या जागीं यरुशलेमांत
राजा केलें. २ योआहाज राज्य करूं लागला
तेव्हां तेवीस वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत तीन
महिने राज्य केलें. ३ मिसरच्या राजानें यरुशलेमांत
येऊन त्यास पदच्युत केलें व देशावर त्यानें शंभर
किक्कार रुपें व एक किक्कार सोनें एवढा खंड बसविला.
४ मिसरच्या राजानें त्याचा भाऊ एल्याकीम यास
यहूदा व यरुशलेम यांवर राजा केलें व त्याचें नांव
बदलून यहोयाकीम असें ठेविलें. त्याचा भाऊ
योआहाज यास नखो मिसर देशीं घेऊन गेला.

५ यहोयाकीम राज्य करूं लागला तेव्हां तो
पंचवीस वर्षांचा होता व त्यानें यरुशलेमांत अकरा वर्षें
राज्य केलें; त्यानें आपला देव परमेश्वर याच्या दृष्टीनें
जें वाईट तें केलें. ६ त्याजवर बाबेलचा राजा नबुख-
द्रेस्सर यानें स्वारी केली व त्याला बाबेलास घेऊन
जाण्यासाठीं त्यानें त्याच्या पायांत बिड्या ठोकिल्या.
७ नबुखद्रेसरानें परमेश्वराच्या मंदिरांतलीं पात्रें
बाबेलास नेऊन तेथील आपल्या मंदिरांत ठेविलीं.
८ यहोयाकीमाचीं बाकीचीं कृत्यें, त्यानें केलेलीं अमंगळ
कृत्यें, त्याच्याठायीं आढळून आलेलें दुष्कर्म हीं सर्व
इस्राएल व यहूदा यांच्या बखरींत लिहिलीं आहेत;
त्याच्या जागीं त्याचा पुत्र यहोयाखीन हा राजा झाला.

९ यहोयाखीन आठ वर्षांचा असतां राज्य करूं
लागला; त्यानें यरुशलेमांत तीन महिने व दहा दिवस
राज्य केलें; परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें केलें.
१० वर्षारंभीं नबुखद्रेस्सरानें सैन्य पाठवून तो व
त्याच्याबरोबर परमेश्वराच्या मंदिरांतलीं मोलवान् पात्रें
हीं बाबेलास आणिलीं आणि त्याचा भाऊ सिद्कीया
यास यहूदा व यरुशलेम यांवर राजा केलें.

११ सिद्कीया राज्य करूं लागला तेव्हां एकवीस
वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत अकरा वर्षें राज्य केलें.
१२ त्यानें आपला देव परमेश्वर याच्या दृष्टीनें जें वाईट तें
केलें; यिर्मया संदेष्टा परमेश्वराकडून त्यास आदेश देत
असतांहि तो त्याजसमोर नम्र झाला नाहीं. १३ नबुख-
द्रेस्सर राजानें त्यास देवाची शपथ वाहावयास लाविलें
होतें; त्याच्या विरुद्धहि त्यानें बंडावा केला; त्यानें आपली
मान ताठ केली, आणि इस्राएलाचा देव परमेश्वर याज-
कडे तो वळला नाहीं, त्यानें आपलें मन कठीण केलें.
१४ त्याप्रमाणेंच सर्व मुख्य याजकांनीं व लोकांनींहि
अन्य राष्ट्रांच्या अमंगळ कृत्यांचें अनुकरण करून घोर
पातक केलें, आणि जें मंदिर परमेश्वरानें यरुशलेमांत
पवित्र केलें होतें तें त्यांनीं भ्रष्ट केलें. १५ त्यांच्या
पूर्वजांचा देव परमेश्वर मोठ्या निकडीनें आपल्या
दूतांच्या हस्तें त्यांस आदेश पाठवी, कारण त्याची
आपल्या प्रजेवर व आपल्या निवासस्थानावर करुणा
होती; १६ पण ते देवाच्या दूतांची टर उडवून
त्यांचीं वचनें तुच्छ मानीत व त्याच्या संदेष्ट्यांची निर्भ-
र्त्सना करीत; शेवटीं परमेश्वराचा कोप त्याच्या लोकां-
वर भडकला व त्यांचा बचाव करण्याचा कांहीं उपाय
राहिला नाहीं. १७ त्यानें त्यांजवर खास्द्यांच्या
राजाची स्वारी आणिली; त्यानें त्यांच्या तरुण पुरुषांस
त्यांच्याच पवित्रभुवनांत तरवारीनें वधिलें; त्यानें तरुणां-
वर किंवा कुमारींवर, वृद्धांवर किंवा वयातीतांवर दया
केली नाहीं; परमेश्वरानें सर्वांस त्याच्या हातीं दिलें.
१८ देवाच्या मंदिरांतील लहानमोठीं सर्व पात्रें व
निधि, आणि राजा व त्याचे सरदार यांचे निधि हीं
सर्व तो बाबेलास घेऊन गेला. १९ खास्दी लोकांनीं
देवाचें मंदिर जाळून टाकिलें, यरुशलेमाचा कोट
पाडून टाकिला, तेथले वाडे आग लावून जाळिले

१ याचें नांव १ इति. ३:१६ येथें यखन्या, व
यिर्मया २२:२४ येथें कोन्या असें आहे.

२ अठरा असें २ राजे २४:८ येथें लिहिलें आहे.

व त्यांतल्या सर्व चांगल्या पात्रांचा नाश केला. २० जे
तरवारीच्या तडाक्यांतून चुकून राहिले त्या सर्वांस
तो राजा बाबेलास घेऊन गेला; पारसाचें राज्य
स्थापीत होईपर्यंत ते त्याचे व त्याच्या वंशजांचे दास
होऊन राहिले; २१ परमेश्वरानें यिर्मयाच्या मुखानें
प्रगट केलेलें वचन पुरें होऊन देशास शांततेचा काळ
प्राप्त व्हावा म्हणून हें सर्व घडलें; देश ओस पडला
होता तोंवर म्हणजे सत्तर वर्षें पुरीं होत तोंपर्यंत त्यांत
शांतता नांदत होती.
२२ यिर्मयाच्या मुखानें प्राप्त झालेलें परमेश्वराचें
वचन सिद्धीस जावें म्हणून पारसाचा राजा कोरेश
याच्या मनास त्याच्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षी
परमेश्वरानें स्फूर्ति दिली, तेव्हां त्यानें आपल्या सर्व
राज्यांत ताकीद दिली व लेखी फर्मान पाठविलें कीं
२३ पारसाचा राजा सायरस अस म्हणतो, स्वर्गींचा देव
परमेश्वर यानें पृथ्वीवरलीं सर्व राज्यें मला दिलीं
आहेत व मला आज्ञा केली आहे कीं यहूदांतील
यरुशलेमांत माझ्याप्रीत्यर्थ एक मंदिर बांध. तर
तुम्हांपैकीं त्याच्या सर्व लोकांतील जो कोणी असेल
त्याच्याबरोबर त्याचा देव परमेश्वर असो; त्यानें
तेथें जावें.

१ मुळांत: शल्वाथ

# एज्रा



१ यिर्मयाच्या मुखानें प्राप्त झालेलें परमेश्वराचें
**१** वचन सिद्धीस जावें म्हणून पारसाचा राजा कोरेश
याच्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षीं परमेश्वरानें
त्या राजाच्या मनास स्फूर्ति दिली; तेव्हां त्यानें
आपल्या सर्व राज्यांत जाहीर केलें व लेखी फर्मानहि
पाठविलें, तें असें: २ पारसाचा राजा कोरेश असें
म्हणतो, स्वर्गींचा देव परमेश्वर यानें पृथ्वीवरील सर्व
राज्यें मला दिलीं असून अशी आज्ञा केली आहे कीं
यहूदा प्रांतांतील यरुशलेमांत माझ्याप्रीत्यर्थ एक मंदिर
बांध; ३ त्याच्या सर्व लोकांपैकीं जो कोणी तुमच्या-
मध्यें असेल त्याजबरोबर त्याचा देव असो; त्यानें
यहूदांतील यरुशलेमास जाऊन इस्राएलाचा देव
परमेश्वर याचें मंदिर बांधावें; यरुशलेमांत जो आहे
तोच देव होय. ४ जो कोणी शेष राहिला असून
एकाद्या ठिकाणीं उपरी म्हणून राहत असेल, त्याला
तेथल्या मनुष्यांनीं चांदी, सोनें, सामानसुमान व पशु
देऊन साहाय्य करावें; याखेरीज यरुशलेमांतील
देवाच्या मंदिराकरितां त्यांनीं स्वसंतोषाचीं अर्पणें
द्यावीं. ५ तेव्हां यरुशलेमांतील परमेश्वराचें मंदिर
बांधण्यासाठीं वरतीं जावयास देवानें ज्यांच्या मनांस
स्फूर्ति दिली ते यहूदा व बन्यामीन यांच्या पितृकुळांचे
प्रमुख, याजक व लेवी उठून सिद्ध झाले. ६ त्यांच्या
आसपासच्या लोकांनीं चांदीचीं पात्रें, सोनें, सामान-
सुमान, पशु व मोलवान् वस्तु देऊन त्यांस
साहाय्य केलें; याखेरीज लोकांनीं जें स्वसंतोषानें दिलें
तें वेगळेंच. ७ नबुखद्नेस्सरानें परमेश्वराच्या मंदिराचीं
जीं पात्रें यरुशलेमाहून आणून आपल्या दैवतांच्या
देवळांत ठेविलीं होतीं तीं सर्व पारसाचा राजा कोरेश
यानें बाहेर काढिलीं; ८ पारसाचा राजा कोरेश यानें
तीं मिथ्रदाथ भांडारी याच्या हस्तें बाहेर काढून यहूदाचा
सरदार शेशबस्सर यास मोजून दिलीं. ९ त्यांची
यादी येणेंप्रमाणें: सोन्याच्या तीस पराती, चांदीच्या
एक हजार पराती, एकुणतीस सुऱ्या, १० सोन्याचे
तीस कटोरे, चांदीचे दुसऱ्या प्रकारचे चारशें दहा

कटोरे व इतर पात्रें एक हजार. ११ सोन्याचांदीचीं
सर्व पात्रें मिळून पांच हजार चारशें होतीं. पाडाव
झालेले लोक बाबेलाहून यरुशलेमास आले तेव्हां
शेशबस्सरानें हीं सर्व पात्रें आणिलीं.

२ १ बाबेलचा राजा नबुखद्नेस्सर यानें जे
लोक पाडाव करून बाबेलास नेले होते त्यांतले
त्या मुलखांत राहणारे बंधमुक्त होऊन यरुश-
लेमास व यहूदांतील आपआपल्या नगरीं परत गेले
ते हे: २ जरुब्बाबेलाबरोबर आले ते येशूवा,
नहेम्या, सराया, रएलाया, मर्दखय, बिलशान, मिस्पार,
बिग्वई, रहूम, बाना. इस्राएल लोकांतल्या मनुष्यांची
ही मोजदाद आहे: ३ पारोशाचे वंशज दोन हजार
एकशें बहात्तर, ४ शफाट्याचे वंशज तीनशें बहात्तर,
५ आरहाचे वंशज सातशें पंचाहत्तर. ६ पहथ-मवाबाचे
वंशज, येशूवा व यवाब यांच्या कुळांतले दोन
हजार आठशें बारा, ७ एलामाचे वंशज एक हजार
दोनशें चौपन्न, ८ जतूचे वंशज नवशें पंचेचाळीस,
९ जक्काईचे वंशज सातशें साठ, १० बानीचे वंशज
सहाशें बेचाळीस, ११ बेबाईचे वंशज सहाशें तेवीस,
१२ अजगादाचे वंशज एक हजार दोनशें बावीस,
१३ अदोनिकामाचे वंशज सहाशें सासष्ट, १४ बिग्वईचे
वंशज दोन हजार छप्पन्न, १५ आदीनाचे वंशज
चारशें चौपन्न, १६ हिज्कीयाच्या वंशांतला आटेर
याच्या कुळांतले अठ्याण्णव, १७ बेसाईचे वंशज
तीनशें तेवीस, १८ योराचे लोक एकशें बारा,
१९ हाशूमाचे लोक दोनशें तेवीस, २० गिबाराचे लोक
पंचाण्णव, २१ बेथलहेमाचे लोक एकशें तेवीस,
२२ नटोफाचे लोक छप्पन्न, २३ अनाथोथचे लोक
एकशें अठ्ठावीस, २४ अजमावेथाचे लोक बेचाळीस,
२५ किर्याथ-आरीम, कफीरा व बैरोथ यांतले लोक
सातशें त्रेचाळीस, २६ रामा व गेबा यांतले लोक
सहाशें एकवीस, २७ मिखमासाचे लोक एकशें बावीस,
२८ बेथेल व आय यांतले लोक दोनशें तेवीस,
२९ नबोचे लोक बावन्न, ३० मग्बीशचे वंशज एकशें
छप्पन्न, ३१ दुसऱ्या एलामाचे वंशज एक हजार दोनशें
चौपन्न, ३२ हारीमाचे वंशज तीनशें वीस, ३३ लोद-
हादीद व ओनो यांतले लोक सातशें पंचवीस,
३४ यरीहोचे लोक तीनशें पंचेचाळीस, ३५ सनाहचे
लोक तीन हजार सहाशें तीस, ३६ याजकांपैकीं:
येशूवाच्या घराण्यांतले यदायाचे वंशज नवशें त्र्याहत्तर.
३७ इम्मेराचे वंशज एक हजार बावन्न,
३८ पशहूराचे वंशज एक हजार दोनशें सत्तेचाळीस,
३९ हारीमाचे वंशज एक हजार सतरा. ४० लेव्यांपैकीं:
होदव्याच्या वंशांपैकीं येशूवा व कदमीएल यांच्या
वंशांतले चौऱ्याहत्तर. ४१ गायकांपैकीं आसाफाच्या
वंशांतले एकशें अठ्ठावीस. ४२ द्वारपालांपैकीं:
शल्लूमाचे वंशज, आहेराचे वंशज, तल्मोनाचे वंशज,
अक्कूबाचे वंशज, हतीताचे वंशज, व शोबाईचे वंशज,
हे सर्व मिळून एकशें एकुणचाळीस. ४३ नथीनीमांपैकीं:
सीहाचे वंशज, हसूफाचे वंशज, तब्बावोथाचे वंशज,
४४ केरोसाचे वंशज, सीहाचे वंशज, पादोनाचे वंशज,
४५ लबानाचे वंशज, हगबाचे वंशज, अक्कूबाचे वंशज,
४६ हागाबाचे वंशज, शम्लाईचे वंशज, हानानाचे
वंशज, ४७ गिद्देलाचे वंशज, गहराचे वंशज,
रायाचे वंशज, ४८ रसीनाचे वंशज, नकोदाचे वंशज,
गज्जामाचे वंशज, ४९ उज्जाचे वंशज, पासेहाचे वंशज,
बेसाईचे वंशज, ५० अस्नाचे वंशज, मऊनीमाचे
वंशज, नफूसीमाचे वंशज, ५१ बक्बुकाचे वंशज,
हकूफाचे वंशज, हर्हुराचे वंशज, ५२ बस्लूथाचे
वंशज, महीदाचे वंशज, हर्षाचे वंशज, ५३ बर्कोसाचे
वंशज, सीसराचे वंशज, तामहाचे वंशज, ५४ नसीहाचे
वंशज, हतीफाचे वंशज, ५५ शलमोनाच्या चाकरांचे
वंशज, सोताईचे वंशज, हस्सोफरताचे वंशज,
परूदाचे वंशज, ५६ जालाचे वंशज, दर्कोनाचे
वंशज, गिद्देलाचे वंशज, ५७ शफाट्याचे वंशज,
हत्तीलाचे वंशज, पोखेरेथ-हस्सबाईमाचे वंशज, आमीचे
वंशज. ५८ सर्व नथीनीम व शलमोनाच्या चाकरांचे
वंशज हे सगळे मिळून तीनशें ब्याण्णव होते.
५९ तेल्मेलह, तेलहर्षा, करूब, अद्दान व इम्मेर एथून
जे वर आले ते हेच होते, परंतु ते इस्राएलांतले होते

किंवा नाहीं याविषयीं आपआपलीं पितृकुळें व आपआपली वंशावळी त्यांना दाखवितां आली नाहीं. ६० दलयाचे वंशज, तोबीयाचे वंशज, नकोदाचे वंशज, सहाशें बावन्न, ६१ आणि याजकांच्या कुळांपैकीं: हबयाचे वंशज, हक्कोसाचे वंशज, बर्जिल्ल्याचे वंशज, त्यानें बर्जिल्ल्य गिलादाच्या एका कन्येशीं विवाह केला, त्यावरून त्याला त्यांचें नांव पडलें. ६२ या सर्वांनीं आपआपल्या वंशावळीचा लेख ज्यांची वंशावळी नोंदली होती त्यांच्या वहींत शोधिला, पण त्यांस तो न मिळाल्यामुळें ते अशुद्ध ठरून याजकपदावरून भ्रष्ट झाले. ६३ तिर्शाथा ( प्रांताधिपति ) त्यांस म्हणाला, उरीम व थुम्मीम धारण करणाऱ्या याजकाची स्थापना होईपर्यंत तुम्ही कोणी परमपवित्र वस्तु खाण्यास पात्र नाहीं. ६४ ही सारी मंडळी मिळून एकंदर बेचाळीस हजार तीनशें साठ होती; ६५ यांशिवाय त्यांचे सात हजार तीनशें सदतीस दास व दासी आणि दोनशें गाणारे व गाणाऱ्या होत्या. ६६ त्यांचीं घोडीं सातशें छत्तीस, त्यांचीं खेचरें दोनशें पंचेचाळीस, ६७ त्यांचे उंट चारशें पस्तीस व त्यांचीं गाढवें सहा हजार सातशें वीस होतीं. ६८ पितृकुळांतील कित्येक प्रमुख पुरुष यरुशलेमांतील परमेश्वराच्या मंदिराकडे आले तेव्हां देवाचें मंदिर पूर्ववत् उभें करावयासाठीं त्यांनीं आपल्या खुशीनें अर्पणें दिलीं; ६९ त्यांनीं आपल्या शक्त्यनुसार एकसष्ट हजार दारिके[१] सोनें, पांच हजार मीने चांदी आणि शंभर याजकीय वस्त्रें भांडारांत पावतीं केलीं. ७० या प्रकारें याजक, लेवी, कित्येक सामान्य लोक, गायक, द्वारपाल, आणि नथीनीम हे आपआपल्या नगरांत राहिले; असे सर्व इस्राएल आपआपल्या नगरांत पुनः वस्ती करून राहिले.

३ १ इस्राएल लोक आपआपल्या नगरांमध्यें राहूं लागल्यावर सातवा महिना सुरू झाला तेव्हां लोक एकचित्त होऊन यरुशलेमांत जमा झाले. २ त्या समयीं येशूवा बिन योसादाक व त्याचे बांधव जे याजक आणि जरुब्बाबेल बिन शल्तीएल व त्याचे बांधव यांनीं उभें राहून देवाचा माणूस मोशे याच्या नियमशास्त्रांत लिहिल्याप्रमाणें होमार्पणें करण्यासाठीं इस्राएलाच्या देवाची वेदी बांधिली. ३ त्यांनीं वेदीची स्थापना पूर्वस्थानीं केली; कारण त्यांला आजूबाजूच्या राष्ट्रांची दहशत पडली होती; तिच्यावर परमेश्वराप्रीत्यर्थ होमार्पणें अर्थात् नित्य सांजसकाळचीं होमार्पणें ते करूं लागले. ४ त्याप्रमाणेंच त्यांनीं पवित्र लेखांत सांगितल्याप्रमाणें मांडवांचा सण पाळिला आणि दररोज प्रयोजन पडेल तेवढे रोजचे होमबलि नियमानुसार अर्पिले. ५ नंतर रोजचे होमबलि, चंद्रदर्शनाचे व परमेश्वरानें पवित्र केलेल्या सर्व नेमलेल्या सणांचे बलि आणि कोणी परमेश्वराला दिलेला स्वसंतोषाचा बलि हे सर्व अर्पिले. ६ सातव्या महिन्याच्या प्रतिपदेपासून ते परमेश्वरास होमबलि अर्पूं लागले; तथापि परमेश्वराच्या मंदिराचा पाया अद्यापि घातला नव्हता. ७ त्यांनीं पाथरवटांस व सुतारांस पैसा दिला आणि पारसाचा राजा कोरेश याच्या परवान्यानें गंधसरूचीं लाकडें लबानोनाहून याफोला जलमार्गानें पोंचतीं करावीं म्हणून त्यांनीं सीदोनी व सोरी लोकांस खाण्यापिण्याच्या वस्तु व तेल हीं दिलीं.

८ यरुशलेमांतील देवाच्या मंदिराप्रत आल्यावर दुसऱ्या वर्षाच्या दुसऱ्या महिन्यांत जरुब्बाबेल बिन शल्तीएल, येशूवा बिन योसादाक व त्यांचे इतर बांधव जे याजक व लेवी होते त्यांनीं आणि जे बंदिवासांतून यरुशलेमास आले होते त्या सर्वांनीं कामास आरंभ केला; वीस वर्षांचे व त्यांहून अधिक वयाचे जे लेवी होते त्यांस परमेश्वराच्या मंदिराच्या कामाची देखरेख करण्यासाठीं नेमिलें. ९ तेव्हां येशूवा, त्याचे पुत्र व बांधव, कदमीएल व त्याचे पुत्र, यहूदाचे वंशज हेनादाद व त्याचे पुत्र, आणि त्यांचे भाऊबंद जे लेवी ते देवाच्या मंदिरांत कारागिरांवर देखरेख करण्यास उभे राहिले. १० बांधकाम करणाऱ्यांनीं परमेश्वराच्य मंदिराचा पाया घातला तेव्हां इस्राएलाचा राजा दावीद यानें लावून दिलेल्या क्रमाप्रमाणें परमे-

१ इराणी लोकांचें नाणें

श्वराचें स्तवन करण्यास आपले पोषाक ल्यालेले व
हातीं कर्णे घेतलेले याजक आणि हातीं झांजा घेतलेले
आसाफ वंशांतले लेवी यांस उभें केलें. ११ परमेश्वर
चांगला आहे व इस्राएलावर त्याची दया सनातन
आहे असें गाऊन त्यांनीं परमेश्वराची स्तुति व धन्यवाद
आळीपाळीनें केला. ते परमेश्वराचें स्तवन करूं लागले
तेव्हां परमेश्वराच्या मंदिराचा पाया घालीत आहेत
हें जाणून सर्व लोकांनीं उच्च स्वरानें जयजयकार
केला. १२ तेव्हां बरेच याजक, लेवी आणि पितृ-
कुळांचे प्रमुख अशा ज्या वृद्ध लोकांनीं पूर्वीचें मंदिर
पाहिलें होतें त्यांनीं आपल्या डोळ्यांनीं या मंदिराचा
पाया घातलेला पाहिला तेव्हां त्यांस रडें कोसळलें व
त्यांतले पुष्कळ हर्षभरानें जयघोष करूं लागले;
१३ जयघोषाचा नाद व लोकांच्या शोकाचा नाद
यांतील भेद लोकांस कळेना, कारण लोक उच्च स्वरानें
जयजयकार करीत होते व त्यांचा शब्द दूरवर ऐकूं
जात होता.

४ १ बंदिवासांतून आलेले लोक इस्राएलाचा देव
परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ मंदिर बांधीत आहेत
असें यहूदा व बन्यामीन यांच्या शत्रूंनीं ऐकलें,
२ तेव्हां ते जरुब्बाबेल व पितृकुळांचे प्रमुख पुरुष
यांच्यापाशीं येऊन म्हणूं लागले, आम्हीहि तुमच्याप्रमाणें
तुमच्या देवाच्या भजनीं लागलों आहों; अश्शूरचा
राजा एसर-हद्दोन यानें आम्हांस इकडे आणून ठेविलें
त्या दिवसापासून त्याच देवास आम्ही यज्ञ करीत
आलों आहों; यास्तव तुमच्याबरोबर आम्हांसहि मंदिर
बांधूं द्या; ३ पण जरुब्बाबेल, येशूवा व इस्राएलाच्या
पितृकुळांचे इतर प्रमुख त्यांस म्हणाले, आमच्या
देवासाठीं मंदिर बांधण्याच्या बाबतींत आमच्याशीं
तुम्हांस कांहीं कर्तव्य नाहीं; तर पारसाचा राजा
कोरेश याच्या आज्ञेप्रमाणें आम्हीच एकत्र होऊन
इस्राएलाचा देव परमेश्वर याचें मंदिर बांधणार. ४ तेव्हां
त्या देशाचे लोक यहूद्यांचे हात कमजोर करून
त्यांस मंदिर बांधण्याच्या कामीं अडथळा करूं लागले.
५ त्यांचा संकल्प व्यर्थ जावा म्हणून त्यांजशीं विरोध
करण्यासाठीं त्यांनीं पैसे देऊन वकील ठेविले; पारसाचा
राजा कोरेश याच्या सर्व कारकीर्दींत व पारसाचा राजा
दारयावेश याच्या कारकीर्दीपर्यंत हें असें चाललें
होतें. ६ अहश्वेरोश राजाच्या कारकीर्दीच्या आरंभीं
त्यांनीं यहूदा व यरुशलेम येथील रहिवाश्यांविरुद्ध
एक कागाळी लिहून पाठविली.

७ अर्तहशस्त याच्या कारकीर्दींत बिश्लाम,
मिथ्रदाथ, ताबेल व त्याचे बरकड स्नेही यांनीं या
पारसाच्या राजास पत्र लिहून पाठविलें; हें पत्र अरामी
लिपींत व अरामी भाषेंत लिहिलें होतें. ८ राजमंत्री
रहूम व लेखक शिमशय यांनीं यरुशलेमाविरुद्ध अर्तह-
शस्त राजास पुढें लिहिल्याप्रमाणें पत्र पाठविलें. ९ त्या
प्रसंगीं रहूम राजमंत्री, शिमशय लेखक व त्यांचे बरकड
स्नेही म्हणजे दिनाई, अफर्सथखी, टर्पली, अफर्शी,
अर्खवी, बाबेली, शूशनखी, देहावी, एलामी, १० इत्यादि
लोक ज्यांस महान् व प्रतापी आसनपर यानें नदीपार
आणून शोमरोन नगरांत व महानदाच्या पश्चिमेकडील
बाकीच्या प्रदेशांत वसविलें होतें, त्यांनीं व इतर
जनांनीं हें पत्र लिहिलें. ११ अर्तहशस्त राजास
त्यांनीं पत्र पाठविलें त्याची नक्कल ही: नदीच्या
पश्चिमेकडील आपले सेवक इत्यादि; १२ महाराजांला कळावें
कीं जे यहूदी आपणाकडून निघून आले ते आमच्याकडे
यरुशलेमास येऊन पोहंचले; त्यांनीं तें बंडखोर व दुष्ट
नगर बांधण्यास सुरुवात केली आहे; त्यांनीं त्याचे कोट
बांधून पुरे केले आहेत व पायाची दुरुस्ती होऊन
चुकली आहे. १३ महाराजांस हें विदित व्हावें कीं तें शहर
बांधण्यांत आलें व त्याचा कोट बांधून झाला तर ते
लोक खंडणी, कर व जकात द्यावयाचे नाहींत; एकंदरींत
महाराजांचा मोठा तोटा होईल. १४ आम्ही तर दरबारचें मीठ
खात आहों व महाराजांची अशी अप्रतिष्ठा झालेली पाहणें
आम्हांस शोभत नाहीं म्हणून आम्ही पत्र पाठवून
महाराजांस हें कळवीत आहों; १५ आपल्या वाडवडिलांच्या
बखरी आपण शोधून पाहाल तर त्यांवरून आपणाला कळून
येईल कीं हें शहर बंडखोर असून राजांस व राष्ट्रांस
उपद्रव करणारें आहे. प्राचीन काळापासून यांत राजद्रोह

माजत आला आहे व यामुळेंच हें शहर उध्वस्त केलें
होतें. १६ आम्ही महाराजांस हें निक्षून सांगतों कीं हें
नगर बांधण्यांत आलें व याचे कोट बांधून तयार
झाले तर महानदाच्या पश्चिमेकडे आपला कांहींच
मुलूख राहावयाचा नाहीं. १७ मग राजानें उत्तर
पाठविलें कीं रहूम राजमंत्री, शिमशय लेखक आणि
शोमरोनांत आणि महानदाच्या पश्चिमेकडे राहणारे
त्यांचे इतर स्नेही यांस सलाम, इत्यादि; १८ तुम्हीं
आम्हांकडे पाठविलेलें पत्र आम्हांसमोर स्पष्टपणें वाचण्यांत
आलें; १९ माझ्या आज्ञेवरून शोध केला
त्यांत असें आढळून आलें कीं प्राचीन काळापासून हें
नगर राजांविरुद्ध बंडावा करीत आलें आहे; बंडावा
व राजद्रोह यांचें हें माहेरघरच आहे; २० या यरुश-
लेमांत पराक्रमी राजे होऊन गेले; त्यांनीं महानदाच्या
पश्चिमेकडल्या सगळ्या देशावर राज्य केलें; लोक
त्यांस खंड, कर व जकात देत असत; २१ तर आतां
असें फर्मान फिरवा कीं या मनुष्यांनीं काम बंद
पाडावें, मजकडून दुसरा हुकूम होईपर्यंत त्यांनीं नगर
बांधूं नये; २२ संभाळा, या गोष्टीसंबंधानें ढिलाई
करूं नका; राजाची हानि करणारा असा हा उपद्रव
कां वाढूं द्यावा? २३ अर्तहशस्त राजाचें हें पत्र रहूम,
शिमशय लेखक व त्यांचे स्नेही यांस वाचून
दाखविलें, तेव्हां ते त्वरा करून यरुशलेमास यहूद्यांकडे
गेले आणि जुलमानें व जबरीनें त्यांनीं त्यांचें काम
थांबविलें. २४ या प्रकारें यरुशलेमांतील देवाच्या
मंदिराचें काम थांबलें आणि पारसाचा राजा दारया-
वेश याच्या कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षापर्यंत
तहकूब राहिलें.

१ त्या समयीं यहूदा व यरुशलेम यांत जे
५ यहूदी राहत होते त्यांस हाग्गय व जखऱ्या बिन इद्दो
हे संदेष्टे इस्राएलाच्या देवाच्या नामानें संदेश देत
असत. २ जरुब्बाबेल बिन शल्तीएल आणि येशूवा
बिन योसादाक हे तयार होऊन यरुशलेमांतील देवाचें
मंदिर बांधूं लागले; देवाचे संदेष्टे त्यांस साहाय्य करीत
असत. ३ त्या वेळेस महानदाच्या पश्चिमेकडच्या प्रांताचा
अधिपति ततनइ व शथर-बोजनइ व त्यांचे स्नेही हे
सर्व त्यांजकडे येऊन म्हणाले, हें मंदिर बांधण्याचा
व हा कोट उभारण्याचा हुकूम तुम्हांस कोणीं दिला
आहे? ४ तेव्हां त्यांनीं आम्हांस म्हटलें कीं जे पुरुष
ही इमारत बांधीत आहेत त्यांचीं नांवें काय? ५ तरी
पण यहूद्यांच्या वडील जनांवर त्यांच्या देवाची कृपादृष्टि
असे म्हणून ही गोष्ट दारयावेशाच्या कानीं जाऊन
तिकडून त्यासंबंधानें लेखी उत्तर येईपर्यंत त्यांनीं
त्या कामास अडथळा केला नाहीं.
६ महानदाच्या पश्चिमेकडील प्रांताचा अधिपति
ततनइ व त्या नदाच्या पश्चिमेकडचे शथर-बोजनइ
व त्याचे स्नेही अफर्सखी यांनीं दारयावेश राजाकडे
पत्र पाठविलें त्याची नकल ही; ७ त्यांनीं त्याजकडे
पत्र पाठविलें त्यांत असें लिहिलें होतें: दारयावेश
महाराजांचें कुशल असो; ८ महाराजांला कळावें कीं
आम्ही यहूदा प्रांतांतील थोर देवाच्या मंदिराकडे गेलों
होतों तेथें पाहतों तों तें मोठ्या पाषाणाचें बांधीत आहेत
व भिंतींवर लाकडेंहि पडलीं आहेत; हें काम मोठ्या
झपाट्यानें चाललें असून त्यांच्या हातांनीं सिद्धीस जात
आहे; ९ तेथल्या वडील जनांस आम्हीं विचारिलें, हें
मंदिर बांधण्यास व हा कोट उभारण्यास तुम्हांस कोणीं
हुकूम दिला आहे? १० त्यांचे प्रमुख कोण आहेत
त्यांचीं नांवें लिहून आपणाला कळवावीं म्हणून आम्हीं
त्यांस तीं विचारिलीं; ११ त्यांनीं आम्हांस हें उत्तर
दिलें; आम्ही स्वर्गाच्या व पृथ्वीच्या देवाचे
दास आहों; जें मंदिर बहुत वर्षांमागें इस्राएलाच्या
एका मोठ्या राजानें बांधून पुरें केलें होतें तें आम्ही
बांधीत आहों; १२ आमच्या वाडवडिलांनीं स्वर्गीच्या
देवास चिडवून संतप्त केलें तेव्हां त्यानें त्यांस बाबेलचा
राजा नबुखद्नेस्सर खास्दी याच्या हातीं दिलें;
त्यानें या मंदिराचा विध्वंस करून येथील लोकांस
बाबेलास नेलें; १३ पण बाबेलचा राजा कोरेश यानें
आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षी देवाचें हें मंदिर
बांधण्याचा हुकूम केला; १४ देवाच्या मंदिरांतलीं
सोन्यारुप्याचीं पात्रें नबुखद्नेस्सरानें यरुशलेमाच्या

मंदिरांतून काढून नेऊन बाबेलांतील मंदिरांत
ठेविलीं होतीं तीं कोरेश राजानें तेथील मंदिरांतून
बाहेर काढून शेशबस्सर नांवाच्या पुरुषास अधिकारी
नेमून त्याच्या हवालीं केलीं; १५ त्यानें त्यास
सांगितलें कीं हीं पात्रें यरुशलेमांतील मंदिरांत
नेऊन ठेव आणि देवाचें मंदिर पूर्ववत् त्याच ठिकाणीं
बांध; १६ मग शेशबस्सरानें येऊन यरुशलेमांतल्या
देवमंदिराचा पाया घातला; तेव्हांपासून आजवर हें
बांधण्याचें काम चालू आहे, अद्यापि हें पुरें झालें
नाहीं; १७ तर कोरेश राजानें यरुशलेमांत देवाचें
मंदिर बांधण्याची आज्ञा दिली होती किंवा नाहीं याचा
शोध महाराजांच्या मर्जीस आल्यास बाबेलच्या राज-
भांडारांत करावा; या प्रकरणीं महाराजांची काय मर्जी
आहे तें आम्हांस कळवावें.

६ १ दारयावेश राजाच्या हुकमावरून बाबेल
येथील दप्तरखान्यांत व जामदारखान्यांत शोध
करण्यांत आला. २ तेव्हां मेदी प्रांतांतल्या
अखमथा नगरांतील राजवाड्यांत एक गुंडाळी
सांपडली; तींत येणेंप्रमाणें लेख लिहिला होता.
३ कोरेश राजाच्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षी
यरुशलेमांतील देवाच्या मंदिरासंबंधानें राजानें जो
ठराव केला तो असा: ज्या स्थानीं यज्ञ करतात तेथें
देवाचें मंदिर बांधावें व त्याचा पाया खंबीर घालावा;
त्याची उंची साठ हात व रुंदी साठ हात असावी;
४ त्याचे तीन थर मोठमोठ्या पाषाणांचे व एक थर
नव्या लाकडांचा असावा; हा सर्व खर्च राजाच्या
खजिन्यांतून करण्यांत यावा; ५ देवाच्या मंदिरांतील
सोन्याचांदीचीं जीं पात्रें नबुखद्नेस्सरानें यरुशलेमांतील
मंदिरांतून बाबेलास आणिलीं आहेत तीं परत नेऊन
यरुशलेमांतील मंदिरांत जेथल्या तेथें ठेवावीं; तीं तूं
देवाच्या मंदिरांत ठेवून दे. ६ तर आतां महानदाच्या
पश्चिमेकडील प्रांताचा अधिपति ततनई, शथर-बोजनई
आणि त्यांचे स्नेही अफर्सखी असे तुम्ही सर्व तेथून
दूर व्हा; ७ देवाच्या मंदिराच्या कामांत हात घालूं
नका; यहूद्यांचा अधिपति व त्यांचे वडील जन यांनीं
हें देवाचें मंदिर त्याच्याच पूर्वीच्या जागीं बांधावें;
८ याखेरीज हें देवाचें मंदिर बांधण्यासाठीं यहूद्यांच्या
वडील जनांशीं तुमचें काय कर्तव्य आहे याविषयीं मी
तुम्हांस अशी आज्ञा करितों कीं राजधनांतून म्हणजे अर्थात्
महानदाच्या पश्चिम प्रांतांच्या करामधून या लोकांस
खर्च तावडतोब पुरवावा; त्यांना कांहीं अडथळा करूं नये;
९ स्वर्गींच्या देवास होमार्पणांसाठीं गोऱ्हे, मेंढे, कोकरें
आदिकरून ज्या वस्तु लागतील त्या आणि गहूं, मीठ,
द्राक्षारस व तेल हीं यरुशलेमांतील याजक जितकीं
मागतील तितकीं प्रतिदिनीं त्यांस द्यावीं; यांत कांहीं खंड
पडूं नये; १० म्हणजे ते स्वर्गींच्या देवास हव्य म्हणून
होमबलि अर्पितील आणि राजा व त्याचे पुत्र दीर्घायु
व्हावे अशी प्रार्थना करितील; ११ मी आणखी असाहि
हुकूम करितों कीं जो कोणी या आज्ञेंत कमीजास्त
करील त्याच्या घराचें बहाल काढून त्यावर त्या
माणसास उचलून टांगावें, आणि या अपराधाबद्दल
त्याच्या घराचा उकिरडा करावा; १२ यरुशलेमांतील
देवाच्या या मंदिराचा विध्वंस करावा ह्या उद्देशानें या
आज्ञेंत जे कोणी खटपटी करितील व जे कोणी राजे
किंवा लोक ती फिरवावी म्हणून तींत हात घालितील
त्या सर्वांचा निःपात ज्या देवानें तेथें आपल्या नामाचा
निवास केला आहे तो करील; मी दारयावेश हा
हुकूम करीत आहें, त्याची त्वरित अंमलबजावणी व्हावी.
१३ दारयावेश राजाच्या ह्या फर्मानाप्रमाणें महा-
नदाच्या पश्चिमेकडील प्रांताचा अधिपति ततनई, शथर-
बोजनई व त्यांचे स्नेही यांनीं तावडतोब केलें.
१४ हाग्गय संदेष्टा आणि जखऱ्या बिन इद्दो यांच्या
संदेशांमुळें यहूदी वडील जन मंदिर बांधीत राहिले
आणि त्यांत त्यांस यश आलें. इस्राएलाच्या देवाच्या
आज्ञेप्रमाणें आणि पारसाचे राजे कोरेश, दारयावेश
व अर्तहशस्त यांच्या फर्मानांबरहुकूम त्यांनीं तें मंदिर
बांधून पुरें केलें. १५ तें मंदिर दारयावेश राजाच्या
कारकीर्दीच्या सहाव्या वर्षी अदार महिन्याच्या तृतीयेस
पुरें झालें. १६ तेव्हां इस्राएल लोक म्हणजे याजक,
लेवी व बंदिवासांतून परत आलेले लोक यांनीं

देवाच्या मंदिराची प्रतिष्ठापना मोठ्या उत्साहानें केली.
१७ या मंदिराच्या प्रतिष्ठापनेच्या समयीं त्यांनीं शंभर
बैल, दोनशें मेंढे, चारशें कोकरें आणि सर्व
इस्राएलासाठीं इस्राएल वंशांच्या संख्येप्रमाणें बारा बकरे
हीं पापार्पणें म्हणून अर्पिलीं. १८ मोशाच्या ग्रंथांत
लिहिल्याप्रमाणें याजकांची त्यांच्या वर्गांप्रमाणें आणि
लेव्यांचीं त्यांच्या क्रमांप्रमाणें यरुशलेम येथील
देवाच्या सेवेप्रीत्यर्थ योजना केली.

१९ पहिल्या महिन्याच्या चतुर्दशीस बंदिवासांतून
परत आलेल्या लोकांनीं वल्हांडण सण पाळिला.
२० याजक व लेवी यांनीं एकचित्तानें आपणांस शुद्ध
केलें होतें; ते शुचिर्भूत झाले होते; त्यांनीं बंदिवासांतून
परत आलेल्या सर्व लोकांसाठीं, आपले भाऊबंद जे
याजक त्यांच्यासाठीं व स्वतःसाठीं वल्हांडणपशु मारिले.
२१ बंदिवासांतून परत आलेल्या इस्राएल लोकांनीं आणि
इस्राएलाचा देव परमेश्वर याच्या भजनीं लागण्यासाठीं
जे सर्व लोक त्या देशाच्या मूर्तिपूजक लोकांच्या अशुद्धते-
पासून दूर राहिले होते त्या सर्वांनीं भोजन केलें;
२२ त्यांनीं बेखमीर भाकरीचा सण सात दिवस
आनंदानें पाळिला, कारण परमेश्वरानें त्यांस आनंदित
केलें होतें आणि इस्राएलांचा देव ह्याच्या मंदिराच्या
कामीं त्यांच्या हातांस जोर यावा म्हणून त्यानें
अश्शूरच्या राजाचें मन त्यांस अनुकूल केलें होतें.

१ यानंतर पारसाचा राजा अर्तहशस्त याच्या
७ कारकीर्दीत एज्रा बिन सराया बिन अजऱ्या बिन
हिल्कीया २ बिन शल्लूम बिन सादोक बिन अहीटूब
३ बिन अमऱ्या बिन अजऱ्या बिन मरायोथ ४ बिन
जरह्या बिन उज्जी बिन बुक्की ५ बिन अबीशूवा
बिन फिनहास बिन एलाजार बिन अहरोन मुख्य
याजक होता; ६ हाच एज्रा बाबेलाहून गेला; हा
इस्राएलाचा देव परमेश्वर यानें दिलेल्या मोशाच्या
नियमशास्त्रांत पारंगत शास्त्री होता; त्याचा देव
परमेश्वर याचा वरदहस्त त्याजवर होता, म्हणून राजानें
त्याचा सारा मनोरथ पूर्ण केला. ७ इस्राएल लोक,
याजक, लेवी, गायक, द्वारपाळ व नथीनीम यांतले
कांहीं जण मिळून अर्तहशस्त राजाच्या कारकीर्दीच्या
सातव्या वर्षी यरुशलेमास गेले. ८ राजाच्या
कारकीर्दीच्या सातव्या वर्षाच्या पांचव्या महिन्यांत एज्रा
यरुशलेमास जाऊन पोहंचला. ९ पहिल्या महिन्याच्या
प्रतिपदेस तो बाबेलाहून निघाला; देवाचा वरदहस्त
त्याजवर असल्यामुळें तो पांचव्या महिन्याच्या
प्रतिपदेस यरुशलेमास पोहंचला. १० परमेश्वराच्या
नियमशास्त्राचें अध्ययन करून त्याप्रमाणें चालण्याचा
आणि इस्राएलास त्यांतले नियम व निर्णय
शिकविण्याचा एज्राचा कृतसंकल्प झाला होता.

११ एज्रा याजक शास्त्री असून परमेश्वराचीं आज्ञा-
वचनें व त्यानें इस्राएलास विहित केलेले नियम यांत
पारंगत होता; त्यास अर्तहशस्त राजानें जें पत्र दिलें
त्याची नक्कल ही: १२ स्वर्गीच्या देवाच्या नियमशास्त्रांत
पारंगत शास्त्री एज्रा याजक यास राजाधिराज
अर्तहशस्त इत्यादि; १३ मी असें फर्मावितों कीं माझ्या
राज्यांतील जे इस्राएल लोक व त्यांचे जे याजक व
लेवी आपखुशीनें यरुशलेमांत जाऊं इच्छीत असतील
त्यांस तुजबरोबर जाण्याची परवानगी आहे; १४ तुज-
जवळ जें देवाचें धर्मशास्त्र आहे तदनुसार यहूदा व
यरुशलेम यांची स्थिति आहे किंवा कसें याचा तपास
करावा म्हणून राजा व त्याचे सात मंत्री यांजकडून तुला
रवाना करण्यांत येत आहे; १५ यरुशलेमनिवासी जो
इस्राएलाचा देव त्यास राजानें व त्याच्या मंत्र्यांनीं
स्वसंतोषानें अर्पण केलेले सोनें व रुपें तूं न्यावें;
१६ तसेंच जेवढें सोनेंरुपें साऱ्या बाबेल प्रांतांत तुला
मिळेल आणि लोक व याजक यरुशलेमांतील
आपल्या देवाच्या मंदिराप्रीत्यर्थ जें स्वसंतोषानें
अर्पण देतील तें सर्व तूं न्यावें; १७ तूं त्या पैशाचे
बैल, मेंढे, कोकरें व त्यांबरोबरचीं अन्नार्पणें व पेयार्पणें
हीं हयगय न करितां खरेदी करून यरुशलेमांतील
तुमच्या देवाच्या मंदिरांत असलेल्या वेदीवर अर्पावीं.
१८ जें सोनेंरुपें शिल्लक राहील त्याचा विनियोग तुला
व तुझ्या भाऊबंदांस योग्य वाटेल तसा आपल्या
देवाच्या इच्छेप्रमाणें करावा. १९ तुझ्या देवाच्या

मंदिराच्या सेवेसाठीं जीं पात्रें तुला देण्यांत येत
आहेत तीं यरुशलेमाच्या देवासमोर सादर कर;
२० याहून आणखी देवाच्या मंदिरास लागणारें जें तुला
द्यावें लागेल तें राजभांडारांतून घ्यावें; २१ मी
अर्तहशश्त राजा महानदाच्या पश्चिमेकडील सर्व
भांडाऱ्यांस अशी आज्ञा करीत आहें कीं एज्रा याजक
जो स्वर्गींच्या देवाच्या नियमशास्त्रांत पारंगत आहे तो
जें कांहीं तुम्हांपाशीं मागेल तें सर्व तावडतोब त्यास
द्यावें; २२ रुपें शंभर किक्कारपर्यंत, गहूं शंभर कोरपर्यंत,
द्राक्षारस शंभर बथपर्यंत, तेल शंभर बथपर्यंत व
लागेल तेवढें मीठ देण्यांत यावें. २३ जी कांहीं आज्ञा
स्वर्गींचा देव करील तीबरहुकूम स्वर्गींच्या देवाच्या
मंदिरासाठीं करण्यांत यावें; राजा व त्याचे पुत्र यांच्या
राज्यावर त्याचा रोष होईल असें कां होऊं द्यावें ?
२४ तसेंच आम्ही असें फर्मावितों कीं देवाच्या या
मंदिरांतील जे कोणी याजक, लेवी, गायक, द्वारपाल,
नथीनीम व इतर सेवक असतील त्यांच्यापासून खंड,
कर अथवा जकात घ्यावयाची नाहीं; २५ हे एज्रा,
तुला तुझ्या देवानें ज्ञान दिलें त्याच्या योगें शास्ते व
न्यायाधीश यांची नेमणूक कर; तुझ्या देवाचें नियम-
शास्त्र जाणणाऱ्या अशा त्या महानदाच्या पश्चिमेकडील
साऱ्या रहिवाश्यांचा त्यांनीं न्यायइनसाफ करावा
आणि त्यासंबंधानें जे अज्ञानी आहेत त्यांस तुम्हीं
शिकवावें. २६ जे कोणी तुझ्या देवाच्या धर्मशास्त्रा-
प्रमाणें आणि राजाच्या कायद्याप्रमाणें वागणार नाहींत
त्यांस तावडतोब शासन करावें; प्राणदंड, हद्दपारी,
मालमत्तेची जप्ती अथवा कैद यांतील कोणतीहि
शिक्षा त्यांस करावी.

२७ यरुशलेमांतील देवाचें मंदिर शोभिवंत करावें
अशी इच्छा राजाच्या मनांत ज्यानें उत्पन्न केली आहे
तो आमच्या पूर्वजांचा देव परमेश्वर धन्य; २८ राजा,
त्याचे मंत्री व राजाचे सर्व पराक्रमी सरदार यांची
मजवर दया व्हावी असें देवानें केलें आहे. माझा
देव परमेश्वर याचा मजवर वरदहस्त होता त्यामुळें
हिंमत धरून मजबरोबर जाण्यासाठीं इस्राएलांतील
प्रमुख पुरुष मीं एकवट केले.

१ अर्तहशश्त राजाच्या कारकीर्दींत माझ्या-
८ बरोबर बाबेलहून आले त्यांच्या पितृकुळांचे प्रमुख
व त्यांची वंशावळी येणेंप्रमाणें: २ फिनहासाच्या
वंशांतला गेर्षोम, इथामाराच्या वंशांतला दानीएल
व दाविदाच्या वंशातला हट्टूश. ३ शखन्याच्या वंशांतला
परोशाच्या कुळांतला जखऱ्या व त्याच्याबरोबर एकशें
पन्नास पुरुषांची गणती वंशावळीप्रमाणें झाली.
४ पहथ-मवाबाच्या वंशांतला एल्यहोवेनय बिन
जरह्या व त्याच्याबरोबर दोनशें पुरुष. ५ शखन्याच्या
वंशांतला यहजीएलाचा पुत्र व त्याच्याबरोबर तीनशें
पुरुष. ६ आदीनाच्या वंशांतला एबद बिन योनाथान
व त्याच्याबरोबर पन्नास पुरुष. ७ एलामाच्या वंशांतला
यशाया बिन अथल्या व त्याच्याबरोबर सत्तर पुरुष.
८ शफाट्याच्या वंशांतला जबद्या बिन मीखाएल व
त्याच्याबरोबर ऐंशीं पुरुष. ९ यवाबाच्या वंशांतला
ओबद्या बिन यहीएल व त्याच्याबरोबर दोनशें अठरा
पुरुष. १० शलोमिथाच्या वंशांतला योसिफ्याचा पुत्र
व त्याच्याबरोबर एकशें साठ पुरुष. ११ बेबाईच्या
वंशांतला जखऱ्या बिन बेबाई व त्याच्याबरोबर
अठ्ठावीस पुरुष. १२ अजगादाच्या वंशांतला योहानान
बिन हक्काटान व त्याच्याबरोबर एकशें दहा पुरुष.
१३ अदोनीकामाच्या वंशांतले जे शेवटचे त्यांची
नांवें हीं: अलीफलेट, येऊएल व शमाया आणि
त्यांच्याबरोबर साठ पुरुष. १४ बिगवईच्या वंशांतले
उथइ व जब्बूद व त्यांच्याबरोबर सत्तर पुरुष.

१५ अहवा नदीला जी नदी मिळते तिच्याजवळ
मीं त्यांस जमविलें; तेथें आम्ही डेरे देऊन तीन
दिवस राहिलों; आणि मीं लोकांची व याजकांची
पाहणी केली तेव्हां मला लेवीच्या वंशांतले कोणी
दिसले नाहींत. १६ मग मीं निरोप पाठवून अलियेजर,
अरीएल, शमाया, एलनाथान, यारीब, एलनाथान,
नाथान, जखऱ्या व मशुल्लाम या प्रमुखांस आणि योयारीब
व एलनाथान या सुज्ञ पुरुषांस बोलावून आणिलें.

१ निर्गम २५:३९ टीप पाहा. २ एक माप.

१७ मीं त्यांस कासिफ्या नांवाच्या स्थानाचा नायक
इद्दो याजकडे पाठविलें आणि आम्हांकडे आमच्या
देवाच्या मंदिराप्रीत्यर्थ सेवाचाकरी करणारे घेऊन
यावें म्हणून कासिफ्या येथें इद्दो व त्याचे बांधव
नथीनीम यांस काय सांगावें हें मीं त्यांस कळविलें.
१८ आमच्या देवाचा आम्हांवर वरदहस्त असल्यामुळें
त्यांनीं आम्हांकडे महली बिन लेवी बिन इस्राएल
याच्या वंशांतला एक समंजस मनुष्य आणिला; आणि
शेरेब्या व त्याचे पुत्र व बांधव असे अठरा जण
आणिले; १९ हशब्या व त्याजबरोबर मरारी वंशां-
तील यशाया आणि त्याचे बांधव व पुत्र मिळून वीस जण
आणिले. २० आणि दावीद व सरदार यांनीं लेव्यांच्या
सेवेसाठीं नेमून दिलेल्या नथीनीमांपैकीं दोनशें वीस
आणिले; या सर्वांचीं नांवें नोंदिलीं. २१ मग मीं
अहवा नदीतीरीं उपवास करण्याचें जाहीर केलें;
त्याचा हेतु असा कीं आम्हीं देवासमोर दीन व्हावें
आणि आम्हांसाठीं, आमच्या मुलांबाळांसाठीं आणि
आमच्या सर्व धनासाठीं बिनधोक्याचा मार्ग प्राप्त
व्हावा असें आम्हीं आमच्या देवासमोर दीन होऊन
मागावें. २२ वाटेनें शत्रूंपासून आमचा बचाव व्हावया-
साठीं राजापाशीं शिपाई व घोडेस्वार यांची टोळी
मागून घेण्याची मला लाज वाटली; कारण आम्ही
राजास असें बोलून चुकलों होतों कीं आमच्या देवास
शरण आलेल्या सर्वांवर त्याचा वरदहस्त असतो, पण
जे त्याचा त्याग करितात त्यांजवर त्याचें बल व क्रोध
हीं प्रगट होतात. २३ यास्तव आम्हीं उपास करून
आपल्या देवाची प्रार्थना केली ती त्यानें ऐकली.
२४ मग मीं याजकांपैकीं शेरेब्या, हशब्या व त्याचे दहा
बांधव अशा बारा प्रमुख पुरुषांस निराळें केलें; २५ जें
सोनेंरुपें व जीं पात्रें राजा, त्याचे मंत्री, त्याचे सरदार
व तेथें असलेले सर्व इस्राएल यांनीं आमच्या देवाच्या
मंदिराप्रीत्यर्थ अर्पिलीं होतीं तीं तोलून मीं त्यांच्या
स्वाधीन केलीं; २६ मीं त्यांच्या हातीं साडेसहाशें किक्कार
चांदी, शंभर किक्कार चांदीचीं पात्रें, शंभर किक्कार
सोनें, २७ हजार [1]दारिक सोन्याचे वीस कटोरे आणि
सुवर्णतुल्य उजळ पितळेचीं दोन पात्रें मीं त्यांस तोलून
दिलीं. २८ मी त्यांस म्हणालों, तुम्हीं परमेश्वराप्रीत्यर्थ
पवित्र आहां, व हीं पात्रेंहि पवित्र आहेत; हें सोनेंरुपें
तुमच्या पूर्वजांचा देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ स्वसंतोषाचें
अर्पण म्हणून आहे. २९ सावध राहा; यरुशलेमांत
मुख्य याजक, लेवी आणि इस्राएलांच्या पितृकुळांतले
सरदार यांच्यासमोर परमेश्वराच्या मंदिराच्या कोठड्यांत
हीं सर्व तोलून देईपर्यंत यांचें रक्षण करा. ३० मग
यरुशलेमांतील आमच्या देवाच्या मंदिराप्रत नेण्यासाठीं
याजक व लेवी यांनीं तें सोनेंरुपें व तीं पात्रें तोलून घेतलीं.
३१ पहिल्या महिन्याच्या द्वादशीस अहवा नदी-
पासून कूच करून आम्हीं यरुशलेमाचा मार्ग धरिला.
आमच्या देवाचा वरदहस्त आम्हांवर असल्यामुळें त्यानें
शत्रूंपासून व वाटेंत घात करण्यास टपून बसणाऱ्यांपासून
आमचें रक्षण केलें. ३२ आम्ही यरुशलेमास पोहंचून
तेथें तीन दिवस राहिलों. ३३ चौथ्या दिवशीं तें
सोनेंरुपें व तीं पात्रें आमच्या देवाच्या मंदिरांत
तोलून मरेमोथ बिन उरीया याजकाच्या हवालीं
केलीं; त्याच्याबरोबर एलाजार बिन फिनहास, योजा-
बाद बिन येशूवा आणि नोअद्या बिन बिन्नुई हे
लेवी होते; ३४ त्या सर्व वस्तु मोजून तोलल्या व त्या
सर्व तोलाची त्या समयीं नोंद केली. ३५ परदेशांतील
बंदिवासांतून परत आलेल्यांनीं इस्राएलाच्या देवास
होमबलि अर्पिले; त्यांनीं सर्व इस्राएलांकरितां पापार्पण
म्हणून बारा गोऱ्हे, शहाण्णव एडके, सत्याहत्तर कोकरें
व बारा बकरे अर्पिले; हीं सर्व परमेश्वराप्रीत्यर्थ
होमार्पण होतीं. ३६ मग त्यांनीं राजाचें फर्मान महा-
नदाच्या पश्चिमेकडील प्रांतांवरील राजाचे मुतालिक
व प्रांताधिपति यांस दिलें; त्यांनीं इस्राएल लोकांस
देवाच्या मंदिराच्या कामीं साहाय्य केलें.

९ १ या सर्व गोष्टी झाल्यावर सरदार मजपाशीं
येऊन म्हणूं लागले, इस्राएल लोक, याजक व लेवी
हे देशोदेशींच्या लोकांपासून निराळे राहत नाहींत;

१ निर्गम २५:२९ टीप पाहा.

१ अ० २:६९ पाहा.

ते कनानी, हित्ती, परिज्जी, यबूसी, अम्मोनी, मवाबी,
मिसरी व अमोरी यांच्याप्रमाणेंच अमंगळ कृत्यें
करितात. २ त्यांनीं आपणांस व आपल्या पुत्रांस
त्यांच्या कन्या केल्या आहेत; पवित्र बीज
देशोदेशींच्या लोकांत मिसळून गेलें आहे; सरदार व
शास्ते यांचा हात या पातकांत प्रमुख आहे. ३ हें मीं
ऐकलें तेव्हां आपलीं वस्त्रें व झगा फाडून आपल्या
डोक्याचे व दाढीचे केस तोडिले व चिंताक्रांत होऊन
खालीं बसलों. ४ मग बंदिवासांतून आलेल्या लोकांच्या
पातकासंबंधानें देवाचें वचन ऐकून जे लोक कंपाय-
मान झाले, ते सगळे माझ्याजवळ जमा झाले, व मी
संध्याकाळच्या अर्पणसमयापर्यंत चिंताक्रांत होऊन
बसलों. ५ उपोषण केलेला, वस्त्र व झगा फाडलेला, अशा
स्थितींत मी संध्याकाळच्या अर्पणसमयीं उठलों
आणि गुडघे टेकून माझा देव परमेश्वर याच्यापुढें
आपले हात पसरून म्हणालों, ६ हे माझ्या देवा, मला
लाज वाटते. मला तुझ्यापुढें तोंड वर करण्यास शरम
वाटते, कारण आमचे अपराध वाढून आमच्या डोक्या-
वरून गेले आहेत व आमचे दोष वाढून गगनास जाऊन
पोहंचले आहेत. ७ आमच्या पूर्वजांच्या काळापासून
आजपर्यंत आम्ही अतिशयित अपराधी आहों; आणि
आमच्या अधर्मांमुळें आम्ही, आमचे राजे व आमचे
याजक अनेक देशांच्या राजांच्या हातीं सांपडून तरवार,
बंदिवास, लुटालूट व लोकलज्जा अशा विपत्तींत
पडलों आहों; आज आमची स्थिति अशीच आहे.
८ सांप्रत थोडे दिवस आमचा देव परमेश्वर यानें
आम्हांवर अनुग्रह केला आहे; आमच्यांतले थोडेसे
लोक वांचून अवशेष ठेविले आहेत आणि आम्हांस
त्याच्या पवित्रस्थानांत एका खुंटीचा आधार मिळाला
आहे; आमच्या देवानें आमचे डोळे सतेज केले आहेत
व आमच्या दास्यांत आम्हांस थोडेंसें नवजीवन
मिळालें आहे. ९ आम्ही दास तर आहोंच, तरी
आमच्या दास्यांत देवानें आमचा त्याग केला नाहीं;
उलट त्यानें पारसदेशीय राजांच्या द्वारें आमच्यावर
कृपादृष्टि केली आहे, यासाठीं कीं आम्हीं नवजीवन
पावून आपल्या देवाचें मंदिर उभारावें, त्याच्या मोड-
तोडीची दुरुस्ती करावी, आणि यहूदा व यरुशलेम
यांत आम्हांस आश्रयस्थान मिळावें. १० तर आतां हे
आमच्या देवा, असें असतां आम्ही काय बोलणार?
आम्हीं तुझ्या आज्ञा मोडिल्या आहेत. ११ तूं आपले
सेवक जे संदेष्टे त्यांच्याद्वारें दिलेल्या आज्ञा आम्हीं
मोडिल्या आहेत; तूं सांगितलें होतें कीं जो देश ताब्यांत
घेण्यास तुम्ही जात आहां तो देश देशोदेशींच्या
लोकांच्या अशुद्धतेमुळें व अमंगळ कृतीमुळें अशुद्ध
झाला आहे; त्यांनीं तो देश या टोकापासून त्या टोका-
पर्यंत आपल्या अशुद्धतेनें भरून टाकिला आहे; १२ तर
तुम्हीं आपल्या कन्या त्यांच्या पुत्रांस देऊं नयेत व
त्यांच्या कन्या आपल्या पुत्रांस करूं नयेत; त्यांचें क्षेम-
कुशल कधींहि चिंतूं नये, म्हणजे तुम्ही मजबुत होऊन
त्या देशचें उत्तम फळ चाखाल आणि आपल्यामागें
आपल्या वंशजांस तो निरंतरचें वतन ठेवून जाल.
१३ आमच्या दुष्कृत्यांमुळें व आमच्या मोठ्या
अपराधांमुळें हें सर्व आम्हांवर ओढवलें असून आमच्या
अपराधास योग्य असलेल्या शिक्षेहून, हे देवा, तूं
आम्हांस कमी शासन केलें व आमच्यांतल्या इतक्या
लोकांस बचावून अवशेष ठेविलें, १४ तर आम्हीं
पुनः तुझ्या आज्ञा मोडून अमंगळ कृत्यें करणाऱ्या ह्या
लोकांशीं सोयरीक करावी काय? अशानें तूं आम्हांवर
कोपायमान होऊन आम्हांस भस्म करिशील आणि आमचा
कोणी अवशेष उरूं देणार नाहींस. असें नाहीं का तूं
करणार? १५ हे परमेश्वरा, इस्राएलाच्या देवा, तूं न्यायी
आहेस, आम्ही केवळ निभावलेले अवशेष आहों; आज
आमची स्थिति अशीच आहे; आम्ही तुजपुढें अपराधी
आहों; यामुळें तुझ्यासमोर कोणास उभें राहतां येत नाहीं.

१ एज्रा देवाच्या मंदिरापुढें पडून रडत
१० असतां व प्रार्थना करून पापांगीकार करीत
असतां इस्राएल स्त्रीपुरुष व मुलेंबाळें यांचा
मोठा समुदाय त्याच्याजवळ जमा झाला; लोक धाय
धाय रडत होते. २ तेव्हां एलाम वंशांतला शखन्या
बिन यहिएल एज्रास म्हणाला, आमच्या लोकांनी या

देशांतील लोकांच्या अन्य जातींच्या स्त्रियांशीं विवाह
करून आपल्या देवाचा अपराध केला आहे; पण या
स्थितींतहि इस्त्राएलासंबंधानें आशा आहे. ३ तर
आतां आमच्या स्वामीच्या उपदेशानुसार आणि
आमच्या देवाच्या धर्मशास्त्राचा ज्यांस धाक आहे
त्यांच्या उपदेशानुसार आम्ही असल्या सर्व स्त्रिया व
त्यांच्या पोटीं झालेली संतति काढून लावितों, अशी
आणभाक आपल्या देवापाशीं करूं या; हें सर्व आपण
धर्मशास्त्राप्रमाणें करूं या. ४ तर आतां ऊठ, हें काम
तुझें आहे; आम्ही तुझ्याबरोबर आहों; हिंमत धरून हें
कर. ५ मग एज्रानें उठून याजक, लेवी व सर्व
इस्त्राएल यांच्या प्रमुख याजकांकडून शपथ वाहविली
कीं आम्ही या वचनानुसार वर्तूं; त्याप्रमाणें त्यांनीं शपथ
वाहिली. ६ मग एज्रा देवाच्या मंदिरापुढून उठला
आणि यहोहानान बिन एल्याशीब याच्या कोठडींत
गेला; तेथें तो गेला तेव्हां त्यानें अन्नपाणी सेवन केलें
नाहीं, कारण बंदिवासांतून आलेल्या लोकांच्या पातका-
स्तव तो शोक करीत राहिला. ७ मग त्यानें यहूदा
व यरुशलेम यांत राहणाऱ्या बंदिवासांतून परत
आलेल्या सर्व लोकांस जाहीर केलें कीं तुम्ही यरुश-
लेमांत एकवट व्हा; ८ सरदार व वडील जन यांचें
सांगणें जो कोणी ऐकणार नाहीं व तीन दिवसांच्या
आंत येणार नाहीं त्याची सर्व जिनगी जप्त होईल
आणि बंदिवासांतून आलेल्या मंडळींतून त्यास निराळें
काढण्यांत येईल. ९ मग यहूदा व बन्यामीन यांतील
सर्व लोक तीन दिवसांच्या आंत यरुशलेमांत एकत्र
झाले; हें सर्व नवव्या महिन्याच्या विसाव्या दिवशीं
घडलें. सर्व लोक देवाच्या मंदिराच्या चौकांत सदरील
कारणास्तव आणि पावसाच्या झडीमुळें थरथर कांपत
बसून राहिले. १० मग एज्रा याजक उभा राहून त्यांस
म्हणाला, तुम्ही आज्ञेचें उल्लंघन करून अन्य जातींच्या
स्त्रियांशीं विवाह केल्यामुळें इस्त्राएलाच्या अपराधांत
भर घातली; ११ तर आतां आपल्या पूर्वजांचा देव
परमेश्वर याच्यासमोर आपलें पाप कबूल करा,
त्याच्या इच्छेप्रमाणें वर्तन करा आणि या देशचे लोक
व अन्य जातींच्या स्त्रिया यांच्यापासून निराळें व्हा.
१२ तेव्हां सगळ्या मंडळीनें उच्च स्वरानें म्हटलें, तूं
सांगतोस त्याप्रमाणें करणें आम्हांस उचित आहे;
१३ पण लोक पुष्कळ आहेत आणि पावसाची झड
लागली असून आम्हांस बाहेर उभें राहतां येत नाहीं,
आणि हें कांहीं एकदोन दिवसांचें काम नव्हे, कारण
आम्हीं या बाबतींत मोठा अपराध केला आहे;
१४ सर्व मंडळीच्या तर्फे आमचे सरदार नेमावे
आणि आमच्या देवाचा भडकलेला तीव्र कोप
आम्हांवरून दूर होई तोंवर आणि या प्रकरणाचें
निराकरण होई तोंवर आमच्या नगरांतल्या ज्या
रहिवाश्यांनीं अन्य जातींच्या स्त्रिया केल्या आहेत
त्यांनीं नेमिलेल्या वेळीं यावें, आणि त्यांच्याबरोबर
प्रत्येक नगरचे वडील जन व न्यायाधीश यावे. १५ या-
संबंधानें केवळ योनाथान बिन असाएल आणि यहज्या
बिन तिकवा यांनीं विरोध केला, आणि मशुल्लाम व
शब्बथई लेवी यांनीं त्यांस साहाय्य केलें.
१६ बंदिवासांतून आलेल्या लोकांनीं सांगितल्याप्रमाणें
केलें. एज्रा याजक व पितृकुळांचे कांहीं प्रमुख
आपआपल्या पितृकुळांप्रमाणें आपलीं नांवें नोंदून
निराळे झाले; आणि दहाव्या महिन्याच्या प्रतिपदेस ते
या बाबीची चौकशी करावयास बसले. १७ ज्यांनीं
ज्यांनीं अन्य जातींच्या स्त्रिया केल्या होत्या त्या सर्व
पुरुषांच्या प्रकरणांचा निकाल त्यांनीं पहिल्या
महिन्याच्या प्रतिपदेपर्यंत केला. १८ याजक वंशांतील
ज्या पुरुषांनीं अन्य जातींच्या स्त्रिया केल्या होत्या ते
हे: येशूवा बिन योसादाक याच्या वंशांतील व त्याच्या
भाऊबंदांच्या वंशांतील मासेया, अलियेजर, यारीब व
गदल्या. १९ आपल्या स्त्रिया काढून लावूं असें वचन
त्यांनीं हातावर हात मारून दिलें; ते दोषी
असल्यामुळें त्यांनीं आपआपल्या दोषाकरितां
आपल्या कळपांतला एकएक मेंढा अर्पिला.
२० इम्मेराच्या वंशांतले: हनानी व जबद्या; २१ आणि
हारीमाच्या वंशांतले मासेया, एलीया, शमाया,
यहीएल व उज्जीया; २२ पशहूराच्या वंशांतले

एल्योवेनय, मासेया, इश्माएल, नथनेल, योजाबाद व
एलासा; २३ लेव्यांपैकीं योजाबाद, शिमि, कलाया
(ऊर्फ कलीटा), पथह्या, यहूदा व अलियेजर; २४ गायकां-
पैकीं एल्याशीब; द्वारपालांपैकीं शल्लूम, तेलेम व ऊरी;
२५ इस्राएलांपैकीं परोशाच्या वंशांतले रम्या, यिज्जीया,
मल्कीया, मियामीन, एलाजार, मल्कीया व बनाया;
२६ एलामाच्या वंशांतले मत्तन्या, जखऱ्या, यहीएल,
अब्दी, यरेमोथ, व एलीया; २७ जत्तूच्या वंशांतले
एल्योवेनय, एल्याशीब, मत्तन्या, यरेमोथ, जाबाद व
अजीजा; २८ बेबाईच्या वंशांतले यहोहानान, हनन्या,
जब्बइ व अथलइ; २९ बानीच्या वंशांतले मशुल्लाम,
मल्लूख व अदाया, याशूब, शाल व रामोथ. ३० पहथ-
मवाबाच्या वंशांतले अदना, कलाल, बनाया, मासेया,
मत्तन्या, बसलेल, बिन्नुई व मनश्शे; ३१ हारीमाच्या
वंशांतले अलियेजर, इश्शीया, मल्कीया, शमाया व
शिमोन, ३२ बन्यामीन, मल्लूख व शमऱ्या; ३३ हाशूमा-
च्या वंशांतले मत्तनई, मत्तथा, जाबाद, अलीफलेट,
यरेमई, मनश्शे व शिमी; ३४ बानीच्या वंशांतले
मादइ, अम्राम, ऊएल, ३५ बनाया, बेदया, कलूही,
३६ वन्या, मरेमोथ, एल्याशीब, ३७ मत्तन्या, मत्तनइ,
यासू, ३८ बानी, बिन्नुइ व शिमी, ३९ शलेम्या,
नाथान, अदाया, ४० मखनदबइ, शाशइ, शारइ,
४१ अजरएल, शेलेम्या, शमऱ्या, ४२ शल्लूम,
अमऱ्या व योसेफ; ४३ नबोच्या वंशांतले ईयेल,
मत्तिथ्या, जाबाद, जबीना, इद्दो, योएल व बनाया;
४४ या सर्वांनीं परदेशीय बायका केल्या होत्या;
आणि त्यांच्यापैकीं कित्येकांच्या पोटीं त्यांस मुलें
झालीं होतीं.

# नहेम्या



१ १ हखल्याचा पुत्र नहेम्या याचा वृत्तांत :—
विसाव्या वर्षी किसलेव महिन्यांत मी शूशन
राजवाड्यांत होतों, २ तेव्हां हनानी नांवाचा एक
माझा बांधव आणि इतर कांहीं लोक यहूदांतून आले;
बंदिवासांतून सुटलेल्यांपैकीं जे यहूदी शेष राहिले होते
त्यांच्याविषयीं व यरुशलेमाविषयीं त्यांजकडे मीं पुस-
तपास केला. ३ त्यांनीं मला सांगितलें, बंदिवासांतले
जे अवशिष्ट लोक त्या प्रांतांत राहिले ते मोठ्या दुर्दशेंत
असून त्यांची अप्रतिष्ठा होत आहे; यरुशलेमाचा तटहि
पडला आहे, व त्याच्या वेशी आग लावून जाळून
टाकिल्या आहेत. ४ हें ऐकतांच मी खालीं बसून रडूं
लागलों आणि बरेच दिवसपर्यंत विलाप करीत राहिलों;
मीं उपास करून स्वर्गींच्या देवाची प्रार्थना केली
कीं ५ हे स्वर्गींच्या देवा, परमेश्वरा, हे थोर व
भयावह देवा, तुझ्यावर प्रीति करणारे व तुझ्या आज्ञा
पाळणारे यांच्यासंबंधानें तूं आपला करार पाळितोस व
त्यांजवर करुणा करितोस: ६ तुझे सेवक इस्राएल
लोक त्यांच्यासाठीं मी तुझा दास या समयीं रात्रंदिवस
प्रार्थना करीत आहें; ती कान देऊन ऐक व डोळे
उघडून पाहा; आम्हीं इस्राएल लोकांनीं तुझ्याविरुद्ध
पातकें केलीं आहेत, तीं मी कबूल करितों; मीं व
माझ्या बापाच्या घराण्यानें पातक केलें आहे. ७ आम्हीं
तुजसमोर अतिशयित दुर्वर्तन केलें आहे आणि तूं
आपला सेवक मोशे यास विहित केलेल्या आज्ञा, नियम
व निर्णय आम्हीं पाळिले नाहींत. ८ तूं आपला
सेवक मोशे यास जें सांगितलें होतें त्याचें स्मरण कर;
तें हें कीं तुम्हीं पातक केल्यास मी तुम्हांस राष्ट्रांमध्यें
विखरीन; ९ पण तुम्ही मजकडे वळलां व माझ्या

आज्ञा मानून त्याप्रमाणें चाललां तर तुमचे परागंदा
झालेले लोक दिगंतीं असले तरी तेथून त्यांस एकवट
करून मी आपल्या नामाच्या निवासार्थ निवडि-
लेल्या स्थानीं आणीन. १० पाहा, हे तुझे सेवक
व तुझे लोक आहेत, त्यांस तूं आपल्या महासामर्थ्यानें
व प्रबळ हस्तानें सोडविलें आहे. ११ हे प्रभू,
मी विनवणी करितों कीं तूं आपल्या ह्या सेवकाच्या
प्रार्थनेकडे व जे तुझे सेवक तुझ्या नामाचें भय बाळ-
गण्यास उत्सुक आहेत त्यांच्या प्रार्थनेकडे कान दे.
तुझ्या सेवकास आज यश दे आणि ह्या मनुष्याची
त्याजवर कृपादृष्टि होईल असें कर. (ह्या वेळीं मी
राजाचा प्यालेबरदार होतों.)

१ अर्तहशस्त राजाच्या कारकीर्दीच्या विसाव्या
२ वर्षी नीसान महिन्यांत राजापुढें द्राक्षारस ठेविलेला
होता तो मीं उचलून राजास दिला. यापूर्वी मी
कधींहि त्याजसमोर खिन्न दिसलों नव्हतों. २ राजा मला
म्हणाला, तूं आजारी नसून तुझें तोंड कां उतरलें आहे?
तुझ्या मनाला कांहीं तरी खेद होत असला पाहिजे; तेव्हां
मी फार भ्यालों. ३ मी राजास म्हणालों, महाराज चिरायु
होवोत; माझ्या वाडवडिलांच्या कबरा जेथें आहेत तें
नगर उजाड पडलें आहे, त्याच्या वेशी अग्नीनें जळून
गेल्या आहेत, तर माझें तोंड कां उतरावयाचें नाहीं?
४ राजानें मला विचारिलें, तुझी विनंति काय आहे?
तेव्हां मीं स्वर्गीच्या देवाची प्रार्थना करून ५ राजास
म्हटलें, महाराजांची मर्जी असली आणि आपण आपल्या
दासावर प्रसन्न असलां तर यहूदा देशीं, माझ्या पूर्वजांच्या
कबरा असलेल्या नगरास मला पाठवा म्हणजे मी तें
बांधीन. ६ राजाजवळ राणी बसली असतां तो मला
म्हणाला, तुझ्या प्रवासास किती दिवस लागतील व तूं
केव्हां परत येशील? नंतर मला पाठविण्याचें राजाच्या
मर्जीस आलें व मीं मुदत ठरवून त्यास कळविली. ७ मग
मी राजास म्हणालों, महाराजांच्या मर्जीस आल्यास मी
यहूदा देशीं पोहंचेपर्यंत महानदाच्या पश्चिमेकडील प्रदेशां-
तून जाऊं देण्याविषयीं तेथल्या अधिपतींच्या नांवांवर
मला पत्रें द्यावीं; ८ आणि महाराजांच्या जंगलाचा अधिपति
आसाफ यास असें पत्र द्यावें कीं मंदिराच्या गढीच्या
दरवाजांसाठीं तुळ्या काढण्यासाठीं, शहरच्या कोटा-
साठीं आणि मी जाऊन राहीन त्या घरासाठीं त्यानें
मला लाकडें द्यावीं. माझ्या देवाचा वरदहस्त मजवर
होता म्हणून राजानें माझी मागणी मान्य केली. ९ मग
मीं महानदाच्या पश्चिमेकडील प्रांताधिपतींकडे जाऊन
त्यांस राजाचीं फर्मानें दिलीं. राजानें मजबरोबर सेना-
नायक व घोडेस्वार पाठविले होते. १० कोणी मनुष्य
इस्राएल वंशाचें कल्याण साधण्यास आला आहे
हें होरोनी सनबल्लट आणि अम्मोनी तोबीया नांवाचा
दास या दोघांनीं ऐकलें, तेव्हां त्यांस फार वाईट
वाटलें. ११ मी यरुशलेमास जाऊन पोहंचल्यावर तेथें
तीन दिवस होतों. १२ मीं रात्रीचा उठून थोडीशी
माणसें बरोबर घेतलीं; यरुशलेमासंबंधानें काय करावें
याविषयीं माझ्या देवानें माझ्या मनांत घातलेला
विचार मीं कोणा मनुष्यास सांगितला नाहीं, आणि
माझ्या बसावयाच्या पाठाळाखेरीज माझ्याबरोबर
दुसरें कोणतेंहि जनावर नव्हतें. १३ मीं रात्रीं खोरे-
वेशीनें बाहेर पडून अजगराच्या झऱ्याकडे, व उकिरडा-
वेशीकडे जाऊन यरुशलेमाचे जे तट पडले होते आणि
तिच्या ज्या वेशी अग्नीनें जळल्या होत्या त्यांची
पाहणी केली. १४ मग मी तसाच पुढें कारंजेवेशी-
कडे व राजकुंडाकडे गेलों, पण माझ्या पाठाळास पुढें
जाण्यास जागा नव्हती. १५ तेव्हां मीं रात्रीं ओहोळा-
च्या वाटेनें वर चढून कोट लक्षपूर्वक पाहिला; मग
मागें वळून खोरेवेशीनें परत आंत आलों. १६ मी
कोठें गेलों होतों व काय केलें होतें हें सरदारांस ठाऊक
नव्हतें; मी अद्यापि यहूदी, याजक, अमीरउमराव,
शास्ते व वरकड कामकरी यांतल्या कोणासहि कांहीं-
एक सांगितलें नव्हतें. १७ मग मी त्यांस म्हणालों,
आपण केवढ्या दुर्दशेंत आहों हें तुम्हांस दिसतच आहे;
यरुशलेम उजाड झालें आहे, व त्याच्या वेशी अग्नीनें
जळून गेल्या आहेत; तर चला, आपण यरुशलेमाचा
कोट बांधूं म्हणजे यापुढें आपली अप्रतिष्ठा व्हावयाची
नाहीं. १८ माझ्या देवाचा वरदहस्त मजवर आहे हें

मी त्यांस सांगितलें, व राजा मला कायकाय बोलला
तेंहि त्यांस सांगितलें. तेव्हां ते म्हणाले, चला,
आपण उठून बांधण्याच्या कामास लागूं. तेव्हां त्यांनीं
हें सत्कार्य करण्याची हिंमत बांधिली. १९ हें ऐकून
होरोनी सनबल्लट आणि अम्मोनी तोबीया नांवाचा
दास आणि गेशेम अरबी यांनीं आमची निर्भर्त्सना
केली; आम्हांस तुच्छ लेखून ते म्हणाले, तुम्हीं हें
काय मांडिलें आहे? राजाविरुद्ध बंड करितां
काय? २० मीं त्यांस उत्तर दिलें कीं स्वर्गीचा
देव आम्हांस यश देईल, म्हणून आम्ही त्याचे सेवक
कमर कसून हें बांधणार; पण यरुशलेमांत तुमचा
हिस्सा, हक्क किंवा यादगिरी कांहींएक नाहीं.

१ मग एल्याशीब मुख्य याजक व त्याचे बांधव
३ याजक हे उठून मेंढवेस बांधूं लागले; त्यांनीं
तिची प्रतिष्ठापना करून तिला कवाडेंहि लावलीं;
हमेआ बुरुजापर्यंत, हननेल बुरुजापर्यंत त्यांनीं तिची
प्रतिष्ठापना केली. २ त्याच्या शेजारीं यरीहोच्या
लोकांनीं बांधकाम केलें; आणि त्यांच्या शेजारीं जक्कूर
बिन इम्री यानें बांधकाम केलें. ३ मत्स्यवेस
हस्सनाच्या पुत्रांनीं बांधिली; त्यांनीं तिला तुळ्या
घातल्या, तिला कवाडें लाविलीं आणि कड्या व अड-
सर लाविले. ४ त्याच्या शेजारीं मरेमोथ बिन उरीया
बिन हक्कोस यानें डागडुजी केली. त्याच्या शेजारीं
मशुल्लाम बिन बरेख्या बिन मशेजबेल यानें डागडुजी
केली. त्याच्या शेजारीं सादोक बिन बाना यानें डाग-
डुजी केली; ५ त्याच्या शेजारीं तकोई यांनीं डागडुजी
केली; पण त्यांच्या महाजनांनीं आपल्या मानेवर
आपल्या प्रभूच्या कामाचें जूं घेतलें नाहीं. ६ जुन्या
वेशीची डागडुजी यहोयादा बिन पासेहा व मशुल्लाम
बिन बसोदया यांनीं करून तिला तुळ्या घातल्या,
तिला कवाडें लाविलीं आणि कड्या व अडसर लाविले.
७ त्यांच्या शेजारीं मलत्या गिबोनी व यादोन मेरोनोथी
यांनीं आणि गिबोन व मिस्पा येथील जे लोक महा-
नदाच्या पश्चिमेकडील प्रांतांच्या अधिपतीच्या आसनाचे
होते त्यांनीं डागडुजी केली. ८ त्यांच्या शेजारीं
सोनारांपैकीं उज्जियेल बिन हरहया यानें डागडुजी केली.
त्याच्या शेजारीं गांध्यांपैकीं हनन्या यानें डागडुजी केली,
रुंद कोटापर्यंत यरुशलेमाची मजबुती केली. ९ त्याच्या
शेजारीं यरुशलेम जिल्ह्याच्या अर्ध्या भागाचा अधि-
कारी रफाया बिन हूर यानें डागडुजी केली. १० त्याच्या
शेजारीं यदाया बिन हरुमफ यानें आपल्या घरा-
समोरच्या तटाची डागडुजी केली. त्याच्या शेजारीं
हत्तूश बिन हशबन्या यानें डागडुजी केली. ११ मल्कीया
बिन हारीम आणि हश्शूब बिन पहथ-मवाब यांनीं
दुसऱ्या एका भागाची व भट्टीबुरजाची डागडुजी
केली. १२ त्याच्या शेजारीं यरुशलेम जिल्ह्याच्या अर्ध्या
भागाचा अधिकारी शल्लूम बिन हल्लोहेश व त्याच्या
कन्या यांनीं डागडुजी केली. १३ खोऱ्यावेशीची डाग-
डुजी हानून व जानोहेकरांनीं केली; त्यांनीं ती बांधून
तिला कवाडें, कड्या व अडसर लाविले, तसेंच
उकिरडावेशीपर्यंत एक हजार हात कोट बांधिला,
१४ उकिरडावेशीची डागडुजी बेथ-हक्करेम जिल्ह्याचा
अधिकारी मल्कीया बिन रेखाब यानें केली; त्यानें
ती बांधून तिला कवाडें, कड्या व अडसर लाविले.
१५ झरावेशीची डागडुजी मिस्पा जिल्ह्याचा अधिकारी
शल्लून बिन कोल-होजे यानें केली; तसेंच त्यानें
ती बांधून तिला छप्पर केलें व कवाडें, कड्या
व अडसर लाविले; तसेंच त्यानें दावीदपुराहून
उतरण्याच्या जिन्यापर्यंत राजाच्या बागेजवळील शेलह
तळ्याचा कोट बांधिला. १६ त्याच्या शेजारीं बेथ-सूर
जिल्ह्याच्या अर्ध्या भागाचा अधिकारी नहेम्या बिन
अजबूक यानें डागडुजी केली; ती त्यानें दाविदाच्या
थडग्यांसमोर, तेथें केलेल्या तळ्यापर्यंत, वीरगृह नामक
ठिकाणापर्यंत केली. १७ त्याच्या शेजारीं लेव्यांपैकीं
रहूम बिन बानी यानें डागडुजी केली. त्याच्या-
जवळच कईला जिल्ह्याच्या अर्ध्या भागाचा अधिकारी
हशब्या यानें आपल्या जिल्ह्यातर्फे डागडुजी केली.
१८ त्याच्या शेजारीं त्यांच्या भाऊबंदांपैकीं कईला
जिल्ह्याच्या दुसऱ्या अर्ध्या भागाचा अधिकारी बवइ
बिन हेनादाद यानें डागडुजी केली. १९ त्याच्या

शेजारीं दुसऱ्या एका भागीं जेथें कोट वळसा घेतो
व शस्त्रागाराकडे जाण्याची चढण लागते तेथें मिस्पाचा
अधिकारी एजेर बिन येशूवा यानें डागडुजी केली.
२० त्याच्या शेजारीं कोट वळसा घेतो तेथून मुख्य
याजक एल्याशीब याच्या घराच्या दारापर्यंत बारूख
बिन जब्बई यानें आस्थेनें दुसऱ्या एका भागाची
डागडुजी केली. २१ त्याच्या शेजारीं एल्याशिबाच्या
घराच्या दारापासून एल्याशिबाच्या घराच्या शेवटा-
पर्यंत मेरेमोथ बिन उरीया बिन हक्कोस यानें दुसऱ्या
एका भागाची डागडुजी केली. २२ त्याच्या शेजारीं
तळवटींत राहणारे याजक यांनीं डागडुजी केली.
२३ त्यांच्या शेजारीं बन्यामीन व हश्शूब यांनीं
आपल्या घरासमोरच्या भागाची डागडुजी केली.
त्यांच्या शेजारीं अजऱ्या बिन मासेया बिन अनन्या
यानें आपल्या घरानजीक डागडुजी केली. २४ त्याच्या
शेजारीं अजऱ्याच्या घरापासून कोट वळसा घेतो तेथवर
व कोपऱ्यापर्यंत बिन्नुई बिन हेनादाद यानें दुसऱ्या
एका भागाची डागडुजी केली. २५ कोट वळसा घेतो
त्यासमोर गारद्यांच्या अंगणाजवळ राजमंदिराबाहेर
असलेल्या उंच बुरुजाची डागडुजी पलाल बिन उजई
यानें केली. त्याच्या शेजारीं पदाया बिन परोश यानें
डागडुजी केली. २६ (नथीनीम हे ओफेलांत,
पूर्वेकडल्या पाणीवेशीसमोर व पुढें आलेल्या बुरुजा-
पर्यंत राहत होते.) २७ पदायाच्या शेजारीं पुढें आलेल्या
मोठ्या बुरुजासमोर ओफेलच्या कोटापर्यंत तकोवा-
करांनीं डागडुजी केली. २८ घोडेवेशीपासून याजकांनीं
आपआपल्या घरापुढें डागडुजी केली. २९ त्यांच्या
शेजारीं सादोक बिन इम्मेर यानें आपल्या घरापुढल्या
भागाची डागडुजी केली. त्याच्या शेजारीं पूर्ववेशीचा
द्वारपाळ शमाया बिन शखन्या यानें डागडुजी केली.
३० त्याच्या शेजारीं हनन्या बिन शलेम्या आणि
सालफाचा सहावा पुत्र हानून यांनीं दुसऱ्या एका
भागाची डागडुजी केली. त्याच्या शेजारीं मशुल्लाम
बिन बरेख्या यानें आपल्या कोठडीपुढें डागडुजी केली.
३१ त्याच्या शेजारीं सोनारांपैकीं मल्कीया यानें
नथीनीम व व्यापारी यांच्या घरापर्यंत हम्मीफकद
वेशीसमोर कोपऱ्यावरच्या कोठीपर्यंत डागडुजी केली.
३२ कोपऱ्यावरच्या कोठीपासून मेंढवेशीपर्यंत सोनारांनीं
व व्यापाऱ्यांनीं डागडुजी केली.

१ आम्ही कोट बांधीत होतों हें सनबल्लटानें
४ ऐकलें तेव्हां त्यास मोठा क्रोध आला व तो
यहूदी लोकांचा उपहास करूं लागला. २ तो
आपले बांधव व शोमरोनचें सैन्य यांच्यासमोर
म्हणाला, हे दुर्बल यहूदी काय करणार ? ते त्यांनीं
करणार काय ? ते यज्ञ करणार काय ? ते एका दिवसांत
सर्व काम आटोपणार काय ? आंच लागलेले पाषाण
मातीच्या ढिगारांतून निवडून घेऊन ते पुनः कामास
लागण्याजोगे करितील काय ? ३ त्याच्याजवळ अम्मोनी
तोबीया होता तो म्हणाला, ते जें बांधकाम करीत
आहेत त्यावर एखादा कोल्हा चढला तरी त्यांचा
कोट पाडून टाकील. ४ हे आमच्या देवा, ऐक,
आमचा धिक्कार होत आहे; ते निर्भर्त्सना करीत
आहेत ती त्यांच्या शिरीं उलट आण; बंदिवासाच्या
देशीं त्यांची लूट होऊं दे; ५ त्यांच्या अधर्मावर झाकण
घालूं नको; त्यांचीं पातकें तुजपुढून पुसून जाऊं नयेत,
कारण त्यांनीं कोट बांधणाऱ्यांसमोर तुला संताप आणिला
आहे. ६ या प्रकारें आम्हीं सर्वांनीं कोट बांधण्याचें
काम चालविलें; तो कोट निम्मा तयार झाला; कारण
लोक अगदीं मन लावून काम करीत होते.
७ यरुशलेमाचा कोट बांधण्याचें काम सपाट्यानें
चाललें आहे, त्यांतलीं खिंडारें बुजूं लागलीं आहेत
असें सनबल्लट, तोबीया, अरबी, अम्मोनी व अश्दोदी
यांनीं ऐकलें तेव्हां त्यांस मनस्वी क्रोध आला; ८ त्या
सर्वांनीं असा एकोपा केला कीं आपण जाऊन यरुशलेमा-
बरोबर लढूं व तेथें धांदल उडवून देऊं; ९ पण आम्हीं
आपल्या देवाची प्रार्थना केली आणि त्यांच्या भीतीनें
त्यांच्यावर अहोरात्र पाळत ठेविली. १० यहूदी लोक
म्हणूं लागले कीं भारवाहकांची शक्ति क्षीण झाली आहे, व
अजून खच फार पडला आहे, तेव्हां आमच्यानें हा
कोट बांधवणार नाहीं. ११ आमचे शत्रु म्हणाले, आम्ही

त्यांच्यामध्यें शिरून त्यांस मारून टाकूं व त्यांचें काम
बंद पाडीपर्यंत त्यांना कांहीं कळावयाचें नाहीं कीं दिसा-
वयाचें नाहीं. १२ मग जे यहूदी त्यांच्याजवळ राहत
होते ते चोहोंकडून आमच्याकडे दहादां येऊन म्हणाले
कीं तुम्ही आमच्याकडे परत या. १३ या कारणास्तव
लोकांच्या हातीं तरवारी, बरच्या व धनुष्यें देऊन
कोटाच्या मागें अगदीं खालच्या खुल्या ठिकाणीं त्यांच्या
घराण्यांप्रमाणें त्यांस बसविलें. १४ ही सर्व व्यवस्था
पाहून मी उठलों आणि सरदार, शास्ते व वरकड लोक
यांस म्हणालों, त्यांची भीति धरूं नका; थोर व भयावह
जो परमेश्वर त्याचें स्मरण करून तुमचे भाऊबंद,
तुमचे कन्यापुत्र, तुमच्या स्त्रिया व तुमचीं घरें
यांच्यासाठीं युद्ध करा. १५ देवानें आमच्या
शत्रूंची मसलत व्यर्थ केली हें आमच्या शत्रूंनीं
ऐकलें तेव्हां आम्ही सगळे कोटाकडे परत
जाऊन आपआपल्या कामावर रुजू झालों. १६ त्या
दिवसापासून माझे अर्धे सेवक कामास लागत व अर्धे
भाले, ढाली, धनुष्यें, चिलखतें धारण करीत, आणि
यहूदाच्या सर्व घराण्यांमागें त्यांचे सरदार उभे असत.
१७ कोट बांधणारे व भारवाहक एका हातानें काम
करीत व दुसऱ्या हातांत शस्त्र धारण करीत.
१८ बांधकाम करणारे आपल्या कमरेस तरवार
लावून काम करीत. रणशिंग वाजविणारा माझ्याजवळ
असे. १९ मीं सरदारांस, शास्त्यांस व वरकड लोकांस
सांगून ठेविलें होतें कीं हें काम मोठें व विस्तृत असून
कोटावर काम करीत असतां आपण एकमेकांपासून
लांबलांब असतों; २० तर रणशिंगाचा शब्द जेथें ऐकूं
येईल तेथें तुम्ही आमच्याकडे एकत्र व्हा; आपला
देव आपल्यातर्फे लढेल. २१ या प्रकारें आम्ही काम
करूं लागलों; त्यांच्यांतले अर्धे लोक पहाटेपासून तारे
दिसूं लागत तोंपर्यंत भाले घेऊन उभे असत.
२२ त्या समयीं लोकांस मीं हेंहि सांगितलें होतें कीं
प्रत्येक मनुष्यानें आपल्या दासासह यरुशलेमाच्या
आंतच रात्रीचें बिऱ्हाडास राहावें म्हणजे ते रात्रीं
आमची रखवाली करितील आणि दिवसां काम करितील.
२३ मी आपले कपडे उतरीत नसें; तसेच माझे भाऊ-
बंद, माझे चाकर आणि माझ्यामागून चालणारे गारदी
कोणीहि आपले कपडे उतरीत नसत; ते सर्व आप-
आपलीं शस्त्रें हातीं घेऊन पाण्याला जात.

५ १ तेव्हां लोकांनीं व त्यांच्या स्त्रियांनीं आपल्या
यहूदी भाऊबंदांविरुद्ध मोठी ओरड केली.
२ कित्येक म्हणूं लागले कीं आम्ही आमचे पुत्र व
कन्या मिळून बहुत जण आहों, म्हणून आमचें पोट
भरण्यास पुरे इतकें अन्न आम्हांस खावयास मिळालें
पाहिजे. ३ कित्येक म्हणूं लागले कीं अन्न मिळावें म्हणून
महागाईमुळें आम्हीं आमचीं शेतें, द्राक्षांचे मळे
व घरें गहाण ठेविलीं आहेत. ४ दुसरे कित्येक
म्हणूं लागले कीं राजाचा कर भरण्यासाठीं आमच्या
शेतांवर व द्राक्षांच्या मळ्यांवर आम्हीं पैसा काढिला
आहे. ५ वस्तुतः पाहतां आमचीं शरीरें आमच्या
भाऊबंदांच्या शरीरांसारखींच आहेत व आमचीं मुलें-
बाळें त्यांच्या मुलाबाळांसारखींच आहेत. पाहा, आम्हीं
आपले पुत्र व कन्या ह्यांना दास्य करण्यासाठीं गुलाम-
गिरींत ठेविलें आहे; आमच्या कांहीं कन्या दासी होऊन
राहिल्या आहेत; त्यांस सोडविण्याची आमच्यांत कांहीं
ताकद राहिली नाहीं, कारण आमचीं शेतें व द्राक्षांचे
मळे दुसऱ्यांच्या हातीं गेले आहेत. ६ हीं त्यांचीं भाषणें
व ओरड ऐकून मला क्रोध आला. ७ मग मी आपल्या
मनांत विचार करून सरदार व शास्ते यांशीं वाद करून
म्हणालों कीं तुम्ही आपल्या बांधवांकडून व्याजदिढी
घेतां. मग मीं त्यांच्याविरुद्ध एक मोठी सभा भरविली.
८ मीं त्यांस म्हटलें कीं जे आपले यहूदी भाऊबंद पर-
राष्ट्रांस विकले गेले होते त्यांची आम्हीं शक्त्यनुसार
सोडवणूक केली; पण तुम्हीं आपल्या भाऊबंदांची
विक्री चालविली आहे काय? त्यांना तुम्ही आम्हांस
विकणार काय? हें ऐकून ते स्तब्ध राहिले; त्यांनीं
चकार शब्दहि काढिला नाहीं. ९ मी आणखी म्हणालों,
तुम्ही जें करीत आहां तें ठीक नव्हे; आपले शत्रु जे
विदेशी लोक त्यांच्यामध्यें आपली अपकीर्ति होत आहे,
म्हणून तुम्हीं आपल्या देवाचें भय धरून चालूं नये

काय? १० तसेंच मी, माझे बांधव व माझे सेवक असे
आम्ही त्यांस पैसा व धान्य वाढीदिढीनें देतों; आपण
हा वाढीदिढीचा व्यवहार सोडिला पाहिजे. ११ तर
आजच्या आज कसेंहि करून त्यांचीं शेतें, त्यांचे
द्राक्षांचे मळे, त्यांचीं जैतूनवनें, त्यांचीं घरेंदारें त्यांस
परत द्या; तसेंच पैसे, अन्न, नवा द्राक्षारस व तेल
यांचा जो शतांश तुम्हीं त्यांच्यापासून काढीत असतां
तो तुम्ही त्यांस परत द्या. १२ तेव्हां ते म्हणाले,
आम्ही त्यांस तीं परत देतों; आम्ही त्यांच्यापासून
कांहीं मागणार नाहीं; तूं म्हणतोस त्याप्रमाणें आम्ही
करितों. मग मीं याजकांस बोलावून आणून, आम्ही
याप्रमाणें करूं, अशी शपथ त्यांच्याकडून घेवविली.
१३ यावर मी आपला पदर झटकून म्हणालों, जो
कोणी या वचनाप्रमाणें करावयाचा नाहीं त्यास परमेश्वर
त्याच्या घरांतून व त्याच्या उद्योगावरून झटकून
टाकील; याप्रमाणें तो झटकला जाऊन रंक होईल.
तेव्हां सर्व मंडळीनें म्हटलें, आमेन, व त्यांनीं परमे-
श्वराचें स्तवन केलें. लोकांनीं या आपल्या वचनाप्रमाणें
केलें. १४ यहूदा देशांत मला त्यांचा अधिपति नेमिलें
तेव्हांपासून म्हणजे अर्तहशस्त राजाच्या कारकीर्दीच्या
विसाव्या वर्षापासून बत्तिसाव्या वर्षापर्यंत बारा वर्षे
मीं व माझे भाऊबंद यांनीं माझ्या अधिपतित्वाच्या
वेतनाचें अन्न खाल्लें नाहीं. १५ माझ्या पूर्वीचे अधिपति
प्रजेवर बोजा लादीत व त्यांच्यापासून भाकरी, द्राक्षारस
घेऊन आणखी चाळीस शेकेल चांदी घेत असत. त्यांचे
सेवक देखील लोकांवर अधिकार गाजवीत; पण मीं
तसें केलें नाहीं, कारण मला देवाचें भय होतें.
१६ मग मीं कोटाचें काम नेटानें चालविलें; आमच्या
लोकांनीं कांहीं जमीन विकत घेतली नाहीं; माझे सर्व
सेवक कामासाठीं तेथें एकवट झाले होते. १७ दीडशें
यहूदी व शास्ते, आणि आमच्या भोवतालच्या
राष्ट्रांतले जे लोक आम्हांकडे येत तेहि माझ्या पंक्तीला
असत. १८ दररोज एक बैल व सहा चांगलीं
मेंढरें शिजवीत आणि माझ्यासाठीं पाखरें तयार
करीत, आणि दर दहा दिवसांनीं सर्व जातींचा द्राक्षा-
रसहि मेजावर येत असे; तरी मीं अधिपतीच्या
वेतनाचें अन्न सेविलें नाहीं, कारण लोकांवर कामाचा
बोजा फार मोठा होता. १९ हे माझ्या देवा, जें कांहीं
मीं या देशाच्या लोकांसाठीं केलें त्याचें तूं स्मरण
करून माझें बरें कर.

६ १ मीं कोट बांधण्याचें संपविलें आणि कोटाला
कोठें तूटफूट राहूं दिली नाहीं, वेशीचे दरवाजे मात्र
अद्यापि लाविले नव्हते; हें सनबल्लट, तोबीया,
गेशेम अरबी व आमचे बरकड शत्रु यांनीं ऐकलें,
२ तेव्हां सनबल्लट व गेशेम यांनीं मला सांगून पाठविलें
कीं चल, आपण ओनोच्या मैदानांतील एकाद्या खेड्यांत
एकमेकांस भेटूं; पण मला कांहीं तरी दगा करण्याचा
त्यांचा मनसोबा होता. ३ हें पाहून मीं जासूद पाठवून
त्यांस कळविलें कीं मी मोठ्या कामांत गुंतलों आहें;
मला येण्याला सवड नाहीं; मीं काम सोडून तुम्हांकडे
कां यावें, काम कां बंद पाडावें? ४ त्यांनीं चार
वेळां माझ्याकडे हाच निरोप पाठविला आणि मींहि
त्यांस असेंच उत्तर दिलें. ५ पांचव्या वेळीं सनबल्लटानें
आपल्या चाकरास हातीं खुली चिठी देऊन मजकडे
पाठविलें; ६ त्या चिठींत असें लिहिलें होतें कीं
निरनिराळ्या राष्ट्रांत अशी बातमी उठली आहे आणि
गेशेमहि असेंच म्हणत आहे कीं तुझा व यहूदी
लोकांचा बंड करण्याचा विचार आहे म्हणून तूं हा
कोट बांधीत आहेस; या अफवेवरून असें दिसतें कीं
तूं त्यांचा राजा होऊं पाहत आहेस. ७ तूं यहूदा
देशांत राजा आहेस असें स्वतांविषयीं यरुशलेमांत
जाहीर करावें म्हणून तूं संदेष्टेहि नेमिले आहेत; हें
वर्तमान राजाच्या कानीं जाणार. ह्याकरितां आतां
आपण एकत्र जमून वाटाघाट करूं. ८ मीं त्यास सांगून
पाठविलें कीं तूं म्हणतोस तसा प्रकार कांहीं घडलेला
नाहीं; ही तुझ्या मनची कल्पना आहे. ९ आमचे हात
दुर्बळ होऊन आमचें काम बंद पडावें म्हणून हे सर्व
लोक आम्हांस भेवडावयास पाहत होते. हे देवा,
माझा हात दृढ कर.

१० मग मी शमाया बिन दलाया बिन महेतबेल

याच्या घरीं आलों; तो दार लावून घेऊन आंत बसला होता; त्यानें म्हटलें, चल, आपण देवाच्या मंदिरांतील आंतल्या गाभाऱ्यांत जमून मंदिराची द्वारें बंद करून घेऊं; कारण ते लोक तुझा घात करण्यास येणार; ते रात्रीचे तुझा घात करण्यास येणार. ११ मी म्हणालों, माझ्यासारख्या मनुष्यानें पळून जावें काय? मंदिरांत जाऊन आपला जीव वांचवावा असा माझ्यासारखा कोण आहे? मी मंदिरांत जाणारच नाहीं. १२ विचार करितां मला असें दिसून आलें कीं देवानें त्यास पाठविलें नाहीं; तरी ही भविष्यवाणी त्यानें माझ्याविरुद्ध सांगितली; तोबीया व सनबल्लट यांनीं त्यास मोल देऊन ठेविलें होतें. १३ मीं घाबरावें व असलें काम करून पापी ठरावें, आणि माझी अपकीर्ति पसरण्यास त्याला कांहीं निमित्त सांपडावें म्हणून त्यास त्यांनीं मोल देऊन ठेविलें होतें. १४ हे माझ्या देवा, तोबीया, सनबल्लट, नोवद्या संदेष्ट्री आणि वरकड संदेष्टे मला घाबरवूं पाहत होते; त्या सर्वांची ही कृति ध्यानांत ठेव.

१५ अलूल महिन्याच्या पंचविसाव्या दिवशीं म्हणजे बावन्न दिवसांच्या आंत कोट बांधून झाला. १६ आमच्या सर्व शत्रूंनीं हें ऐकलें तेव्हां आमच्या सभोवतालीं राहणाऱ्या विदेशी लोकांना भीति व लाज वाटली, कारण हें काम आमच्या देवाकडून घडलें असें त्यांस दिसून आलें. १७ या काळीं यहूदांतल्या महाजनांचीं पत्रें तोबीयास जात असत, व तोबीयाचीं पत्रें त्यांस जात असत. १८ तो शखन्या बिन आरह याचा जांवई होता, आणि त्याचा पुत्र योहानान यानें बरेख्याचा पुत्र मशुल्लाम याच्या कन्येशीं लग्न केलें होतें, म्हणून यहूदांतल्या पुष्कळ लोकांनीं त्याच्या पक्षानें राहण्याची आणभाक केली होती. १९ ते माझ्यासमोर त्याच्या सत्कृत्याची तारीफ करीत आणि माझे शब्द त्याला जाऊन सांगत. तोबीया मला भेडसावण्याकरितां पत्रें पाठवीत असे.

७ १ कोट बांधण्याचें काम संपल्यावर मीं त्यास दरवाजे लाविले आणि द्वारपाल, गायक आणि लेवी यांची नेमणूक केली, २ तेव्हां मीं आपला भाऊ हनानी व गढीचा अधिपति हनन्या यांस यरुशलेमाचे अधिकारी नेमिलें; हा हनन्या इमानी असून इतर पुष्कळ लोकांहून देवाचें भय विशेष बाळगीत असे. ३ मीं त्यांस सांगितलें, उन्हाचा ताप होईपर्यंत यरुशलेमाच्या वेशी उघडूं नयेत, लोक काम करीत असतां वेशींचे दरवाजे लावून त्यांस अडसर घालावे, यरुशलेमकरांचे पहारे नेमावे आणि प्रत्येकानें आपआपल्या घरासमोर पहारा करावा. ४ नगर विस्तीर्ण व मोठें होतें, पण त्यांत लोक थोडे असून अद्यापि घरें बांधिलीं नव्हतीं. ५ सरदार, शास्ते व इतर लोक जमा करून त्यांची वंशावळीप्रमाणें गणती करावी असें माझ्या देवानें माझ्या मनांत घातलें. जे प्रथम यरुशलेमांत आलें होते त्यांच्या वंशावळीची वही मला सांपडली व त्यांत हें लिहिलेलें सांपडलें: ६ बाबेलच्या नबुखद्नेस्सर राजानें जे लोक धरून नेले होते त्यांतले त्या मुलखांत राहत होते ते लोक बंधमुक्त होऊन यरुशलेमास व यहूदांतील आपआपल्या नगरांत परत गेले ते हे: ७ येशूवा, नहेम्या, अजऱ्या, राम्या, नहमानी, मर्दखय, बिलशान, मिस्पेरेथ, बिग्वाइ, नहूम व बाना जे जरुब्बाबेलाबरोबर आले ते हेच. इस्राएल लोकांतल्या मनुष्यांची संख्या ही होती: ८ परोशाचे वंशज दोन हजार एकशें बहात्तर, ९ शफाट्याचे वंशज तीनशें बहात्तर, १० आरहाचे वंशज सहाशें बावन्न, ११ येशूवा व यवाब यांच्या कुळांतील पहथमवाबाचे वंशज दोन हजार आठशें अठरा, १२ एलामाचे वंशज एक हजार दोनशें चौपन्न, १३ जत्तूचे वंशज आठशें पंचेचाळीस, १४ जक्काईचे वंशज सातशें साठ, १५ बिन्नुईचे वंशज सहाशें अठ्ठेचाळीस, १६ बेबाईचे वंशज सहाशें अठ्ठावीस, १७ अजगदाचे वंशज दोन हजार तीनशें बावीस, १८ अदोनी-

कामाचे वंशज सहाशें सदुसष्ट, १९ बिग्वाईचे वंशज
दोन हजार सदुसष्ट, २० आदीनाचे वंशज सहाशें
पंचावन्न, २१ हिज्कीयाच्या आटेराचे वंशज अठ्याण्णव,
२२ हाशुमाचे वंशज तीनशें अठ्ठावीस, २३ बेसाईचे
वंशज तीनशें चोवीस, २४ हारिफाचे वंशज एकशें
बारा, २५ गिबोनाचे वंशज पंचाण्णव, २६ बेथ-
लहेम व नटोफा येथील मनुष्यें एकशें अठ्याऐशीं,
२७ अनाथोथाचीं मनुष्यें एकशें अठ्ठावीस, २८ बेथ-
अजमावेथाचीं मनुष्यें बेचाळीस, २९ किर्याथ-यारीम,
कफीरा व बैरोथ येथील मनुष्यें सातशें त्रेचाळीस,
३० रामा व गेबा येथील मनुष्यें सहाशें एकवीस,
३१ मिखमासाचीं मनुष्यें एकशें बावीस, ३२ बेथेल
व आय येथील मनुष्यें एकशें तेवीस, ३३ दुसऱ्या
नबोचीं मनुष्यें बावन्न, ३४ दुसऱ्या एलामाचे वंशज
एक हजार दोनशें चौपन्न, ३५ हारिमाचे वंशज
तीनशें वीस, ३६ यरीहोचे वंशज तीनशें पंचेचाळीस,
३७ लोद, हादीद व ओनो यांचे वंशज सातशें
एकवीस, ३८ सनावाचे वंशज तीन हजार नऊशें
तीस. ३९ याजक: यदयाच्या कुळांतील येशूवाच्या
घराण्यांतले नऊशें त्र्याहत्तर, ४० इम्मेराचे वंशज
एक हजार बावन्न, ४१ पशहूराचे वंशज एक हजार
दोनशें सत्तेचाळीस, ४२ हारिमाचे वंशज एक
हजार सतरा. ४३ लेवी: येशूवाचे वंशज
कदमीएलाचे होदवाच्या वंशजांतले चौऱ्या-
हत्तर. ४४ गाणारे: आसाफाचे वंशज एकशें
अठ्ठेचाळीस. ४५ द्वारपाल शल्लूमाचे वंशज, अटेराचे
वंशज, तल्मोनाचे वंशज, अक्कूबाचे वंशज, हतीताचे
वंशज, शोबाचे वंशज, एकशें अडतीस.
४६ नथीनीम: सिहाचे वंशज, हसूफाचे वंशज,
तबायोथाचे वंशज, ४७ केरोसाचे वंशज, सीयाचे
वंशज, पादोनाचे वंशज, ४८ लबोनाचे वंशज,
हगाबाचे वंशज, सल्माईचे वंशज, ४९ हानानाचे
वंशज, गिद्देलाचे वंशज, गहाराचे वंशज, ५० रायाचे
वंशज, रसीनाचे वंशज, नकोदाचे वंशज,
५१ गज्जामाचे वंशज, उज्जाचे वंशज, पासेहाचे
वंशज, ५२ बेसईचे वंशज, मऊनीमाचे वंशज,
नफूशेसीमाचे वंशज, ५३ बकबूकाचे वंशज, हकूफाचे
वंशज, हर्हूराचे वंशज, ५४ बसलीथाचे वंशज,
महीदाचे वंशज, हर्शाचे वंशज, ५५ बर्कोसाचे वंशज,
सीसराचे वंशज, तामहाचे वंशज, ५६ नसीहाचे
वंशज, हतीफाचे वंशज. ५७ शलमोनाच्या चाकरांचे
वंशज: सोताईचे वंशज, सोफेरेथाचे वंशज, परीदाचे
वंशज, ५८ यालाचे वंशज, दर्कोनाचे वंशज,
गिद्देलाचे वंशज, ५९ शफाट्याचे वंशज, हत्तीलाचे
वंशज, सबाइमाच्या पोखरेथाचे वंशज, आमोनाचे
वंशज, ६० सर्व नथीनीम व शलमोनाच्या चाकरांचे
वंशज मिळून तीनशें ब्याण्णव होते. ६१ तेल-मेलह,
तेल-हर्षा, करूब, अद्दोन व इम्मेर एथून जे वर आले
ते हेच; पण ते इस्राएलांपैकीं होते कीं नव्हते
याविषयीं त्यांना आपआपलें पितृकुळ व आप-
आपली वंशावळी दाखवितां आली नाहीं: ६२ दलायाचे
वंशज, तोबीयाचे वंशज, नकोदाचे वंशज सहाशें
बेचाळीस. ६३ याजकांपैकीं: हबायाचे वंशज, हक्कोसाचे
वंशज व बार्जिल्ल्याचे वंशज; या बार्जिल्ल्यानें गिलादी
बार्जिल्ल्य याच्या कन्यांपैकीं एकीशीं लग्न केलें, आणि
त्याचें नांव घेतलें. ६४ यांनीं आपलें वंशावळीचें पत्र
इतर वंशावळ्यांच्या पत्रांत धुंडून पाहिलें, पण तें सांपडलें
नाहीं म्हणून ते अशुद्ध ठरून त्यांस याजकपदाच्या
यादींतून काढून टाकिलें. ६५ तिर्शाथा ( प्रांताधिपति )
यानें त्यांस सांगितलें कीं उरीम व थुम्मीम धारण करणारा
याजक उभा राहीपर्यंत तुम्ही कोणी परम पवित्र वस्तु
खाऊं नयेत. ६६ साऱ्या मंडळींतले लोक मिळून
बेचाळीस हजार तीनशें साठ भरले; ६७ त्यांखेरीज
त्यांच्या सात हजार तीनशें सदतीस दासदासी व
दोनशें पंचेचाळीस गाणारे व गाणारणी होत्या.
६८ त्यांचे घोडे सातशें छत्तीस, खेचरें दोनशें पंचे-
चाळीस, ६९ उंट चारशें पस्तीस व गाढवें सहा हजार
सातशें वीस एवढी होतीं. ७० पितृकुळांच्या प्रमुखां-

पैकीं कांहींनीं या कार्यास मदत केली. तिर्शाथानें एक
हजार दारिक सोनें, पन्नास कटोरे व पांचशें तीस
याजकीय वस्त्रें एवढीं खजिन्यांत पावतीं केलीं.
७१ पितृकुळांतील आणखी कांहीं पुरुषांनीं या
कामाच्या खजिन्यांत वीस हजार दारिक सोनें आणि
दोन हजार दोनशें माने रुपें पावतें केलें. ७२ वरकड
लोकांनीं वीस हजार दारिक सोनें, दोन हजार माने
रुपें आणि सदुसष्ट याजकीय वस्त्रें पावतीं केलीं.
७३ या प्रकारें याजक, लेवी, द्वारपाल, गायक व
इतर कांहीं लोक, नथीनीम व सर्व इस्राएल आप-
आपल्या नगरांत राहूं लागले.

सातवा महिना आला तेव्हां सर्व इस्राएल आप-
आपल्या नगरांत होते. १ मग ते सर्व लोक
८ एकचित्त होऊन पाणीवेशीजवळच्या चौकांत एकत्र
जमले व एज्रा शास्त्री यास म्हणाले, परमेश्वरानें
इस्राएल लोकांस विहित केलेला नियमशास्त्राचा मोशे-
कृत ग्रंथ घेऊन या. २ तेव्हां मंडळींतील स्त्रीपुरुषांपुढें
व ज्यांस ऐकून समजण्याचें सामर्थ्य होतें त्या सर्वांपुढें
एज्रा याजकानें तो धर्मग्रंथ आणिला. ३ त्यांतील वचनें
त्यानें पहाटपासून दोन प्रहरपर्यंत पाणीवेशीसमोरच्या
चौकांत स्त्रीपुरुषांपुढें व ज्यांस ऐकून समजण्याचें
सामर्थ्य होतें त्यांच्यापुढें वाचिलीं, आणि सर्व लोकांनीं
नियमशास्त्राचा ग्रंथ कान देऊन ऐकला. ४ लोकांनीं
मुद्दाम केलेल्या एका लाकडी पीठावर एज्रा शास्त्री उभा
राहिला व त्याच्याजवळ उजवीकडे मत्तिथ्या, शेमा,
अनाया, उरीया, हिल्कीया व मासेया हे उभे राहिले;
व त्याच्या डावीकडे पदाया, मीशाएल, मल्खीया, हाशूम,
हश्बद्दाना, जखऱ्या व मशुल्लाम हे उभे राहिले. ५ एज्रानें
उभें राहून तो ग्रंथ उघडिला; तेव्हां एज्रा सर्वांस
दिसला, कारण तो सर्वांहून उंच ठिकाणीं उभा होता;
त्यानें तो ग्रंथ उघडिला तेव्हां सर्व लोक उभे राहिले;
६ मग एज्रानें देवाधिदेव परमेश्वर याचा धन्यवाद
केला, व सर्व लोकांनीं आपले हात वर करून आमेन !
आमेन ! असें म्हटलें आणि आपलीं डोकीं लववून
व आपलीं मुखें भूमीकडे करून परमेश्वरास प्रणाम
केला. ७ येशूवा, बानी, शेरेब्या, यामीन, अक्कूब,
शब्बथइ, होदीया, मासेया, कलीता, अजऱ्या, योजा-
बाद, हानान व पलाया, हे लेव्यांसुद्धां नियमशास्त्राचा
अर्थ लोकांस समजावून सांगत होते; व लोक आपल्या
स्थानीं उभे होते. ८ त्यांनीं तो ग्रंथ, तो देवाच्या
शास्त्राचा ग्रंथ, स्पष्टीकरणासह वाचून दाखविला; वाचलें
तेवढें लोकास चांगलें समजलें. ९ मग नहेम्या
तिर्शाथा (प्रांताधिपति), एज्रा याजक, शास्त्री आणि
लोकांस शिकविणारे लेवी हे सर्व लोकांस म्हणाले,
हा दिवस तुमचा देव परमेश्वर याच्याप्रीत्यर्थ पवित्र
आहे, तर शोक करूं नका; रडूं नका. कारण ते लोक
नियमशास्त्रांतलीं वचनें ऐकून रडूं लागले होते.
१० तेव्हां त्यानें त्यांस सांगितलें, जा, मिष्टान्नाचें
सेवन करा; गोडगोड पेयें प्या व ज्यांच्या घरीं
कांहीं तयार नसेल त्यांस वाढून पाठवा; कारण
आजचा दिवस परमेश्वराप्रीत्यर्थ पवित्र आहे;
तुम्ही उदास राहूं नका; कारण परमेश्वराविषयींचा
जो आनंद तोच तुमचा आश्रयदुर्ग होय. ११ शांत
राहा, कारण आजचा दिवस पवित्र आहे, दुःख करूं
नका, असें म्हणून लेव्यांनीं लोकांस शांत केलें.
१२ नंतर सर्व लोक खाणेंपिणें करण्यास, एकमेकांस
ताटें वाढून पाठविण्यास व मोठा उत्सव करण्यास
निघून गेले, कारण जीं वचनें त्यांस वाचून दाखविलीं
होतीं तीं त्यांस समजलीं होतीं.

१३ दुसऱ्या दिवशींहि सर्व लोकांच्या पितृकुळां-
तील प्रमुख पुरुष, याजक व लेवी नियमशास्त्राचीं
वचनें लक्षपूर्वक ऐकण्यासाठीं एज्रा शास्त्री याच्याजवळ
जमा झाले. १४ त्या धर्मशास्त्रांत असें लिहिलेलें त्यांस
आढळलें कीं परमेश्वरानें मोशास आज्ञा दिल्याप्रमाणें
इस्राएल लोकांनीं सातव्या महिन्याच्या पर्वणीस मांडवांत
राहावें; १५ आपल्या सर्व नगरानगरांत व यरुशलेमांत
त्यांनीं लोकांना जाहीर करावें व कळवावें कीं पहाडावर
जाऊन जैतून, रानजैतून, मेंदी, खजुरी आणि दाट
पालवीचे वृक्ष यांच्या डाहळ्या आणून शास्त्रांत लिहिलें

१ एज्रा २:६९ टीप पाहा.

आहे त्याप्रमाणें मांडव करावे. १६ मग लोकांनीं बाहेर
जाऊन डाहळ्या आणिल्या आणि आपआपल्या घरांच्या
धाब्यांवर, त्यांच्या अंगणांत, देवाच्या मंदिराच्या अंग-
णांत, पाणीवेशीच्या चौकांत आणि एफ्राईमवेशीच्या
चौकांत मांडव घातले. १७ जे लोक बंदिवासांतून
सुटून परत आले होते त्यांचा अवघा मेळा मांडव
घालून त्यांत राहिला; नुनाचा पुत्र येशूवा याच्या
काळापासून ह्या दिवसपर्यंत इस्राएल लोकांनीं कधीं
असें केलें नव्हतें. चोहोंकडे आनंदच आनंद झाला.
१८ पहिल्या दिवसापासून शेवटल्या दिवसापर्यंत एज्रा
देवाच्या नियमशास्त्राचा ग्रंथ नित्य वाची. या प्रकारें
त्यांनीं सात दिवसपर्यंत सण पाळिला, आणि आठव्या
दिवशीं विधिपूर्वक सणाचा समारोप केला.

९

१ याच महिन्याच्या चोविसाव्या दिवशीं इस्रा-
एल लोक उपास करून गोणताट पांघरून व
डोक्यांत धूळ घालून एकवट झाले. २ इस्राएल
वंशांतील लोक विदेश्यांपासून निराळे झाले, आणि उभे
राहून त्यांनीं आपलीं पातकें आणि आपल्या पूर्वजांचे
अपराध कबूल केले. ३ ते आपल्या जागीं उभे राहून
प्रहर दिवसपर्यंत आपला देव परमेश्वर याच्या नियम-
शास्त्राचा ग्रंथ वाचीत राहिले, व आणखी एक प्रहर
आपलीं पातकें कबूल करीत आणि आपला देव परमे-
श्वर याची उपासना करीत राहिले. ४ मग येशूवा,
बानी, कदमीएल, शबन्या, बुन्नी, शेरेब्या बानी व
कनानी यांनीं लेव्यांच्या जिन्यांवर उभें राहून उच्च
स्वरानें आपला देव परमेश्वर याचा धावा केला. ५ मग
येशूवा, कदमीएल, बानी, हशबन्या, शेरेब्या, होदीया,
शबन्या व पथह्या हे लेवी म्हणाले, उभे राहा, आणि
आपला देव परमेश्वर याचा येणेंप्रमाणें धन्यवाद अनंत-
काळ करा: तुझें वैभवशाली नाम धन्य असो; तें सर्व
धन्यवाद व स्तवन यांपलीकडे आहे; ६ तूंच एक परमे-
श्वर आहेस; आकाश व अत्युच्च आकाश व त्यांतील
सर्व नक्षत्रगण, पृथ्वी व तीवर सर्व वसणारे, जलाशय,
त्यांत असलेलें सर्व कांहीं यांचा तूं उत्पन्नकर्ता व
पालनकर्ता आहेस; स्वर्गांतील सेना तुला नमन करिते;
७ हे परमेश्वरा, तूंच देव आहेस; तूं अब्रामास निवडून
घेऊन खास्द्यांच्या ऊर गांवांतून बाहेर आणिलें व त्यास
अब्राहाम हें नांव ठेविलें; ८ आणि त्याचें अंतःकरण
तुझ्यासंबंधानें एकनिष्ठ आहे असें पाहून तूं त्याच्याशीं
करार केला कीं मी तुझ्या वंशास कनानी, हित्ती,
अमोरी, परिज्जी, यबूसी व गिर्गाशी यांचा देश देईन;
तूं हें आपलें वचन पुरें केलें आहे, कारण तूं न्यायी
आहेस; ९ नंतर तूं मिसर देशांत आमच्या पूर्वजांचे
कष्ट पाहिले व तांबड्या समुद्राच्या तीरीं त्यांचा धावा
ऐकला; १० फारो, त्याचे सेवक, त्याच्या देशचे सर्व
लोक यांस चिन्हें व अद्भुत कृत्यें तूं दाखविलीं; कारण
ते त्यांजशीं गर्वानें वागत होते हें तुला ठाऊक होतें; तूं
आपल्या नामाचा महिमा प्रगट केला; तो आजवर
आहे. ११ तूं त्यांच्यासमोरून समुद्र दुभंग केला, असा
कीं ते समुद्रामधून, कोरड्या जमिनीवरून चालून गेले;
धोंडा महाजलाशयांत टाकावा त्याप्रमाणें तूं त्यांचा
पाठलाग करणाऱ्यांस समुद्रतळीं फेकिलें. १२ तूं त्यांस
दिवसा मेघस्तंभानें नेलें, आणि रात्रीं ज्या वाटेनें त्यांनीं
जावयाचें तिच्यावर प्रकाश मिळावा म्हणून अग्निस्तंभानें
त्यांस मार्ग दाखवून नेलें. १३ तूं सीनाय पर्वतावर उतरून
त्यांशीं स्वर्गांतून बोललास आणि त्यांस योग्य निर्णय,
खरे कायदे, चांगले नियम व आज्ञा लावून दिल्या;
१४ तूं त्यांस आपल्या पवित्र शब्बाथाचा परिचय
करून दिला, आणि तुझा सेवक मोशे याच्या हस्तें
तूं त्यांस आज्ञा, नियम व धर्मशास्त्र हीं विहित केलीं;
१५ आणि त्यांची क्षुधा भागविण्यासाठीं तूं आकाशांतून
त्यांस अन्न दिलें, त्यांची तृषा शमविण्यासाठीं
खडकांतून पाणी काढिलें आणि त्यांस अशी आज्ञा
केली कीं जो देश तुम्हांस देण्यासाठीं मीं बाहु
उभारून आणभाक केली आहे त्याचा ताबा घेण्यासाठीं
तुम्ही त्यांत जा. १६ तथापि त्यांनीं व आमच्या
पूर्वजांनीं उन्मत्त होऊन आपली मान ताठ केली व
तुझ्या आज्ञांचा अवमान केला; १७ त्यांनीं हुकूम
मानण्याचें नाकारिलें, आणि जीं आश्चर्यकृत्यें तूं त्यांच्या-
मध्यें केलीं होतीं त्यांची त्यांनीं परवा केली नाहीं; पण

त्यांनीं आपली मान ताठ करून एवढें बंड केलें कीं
आपल्या दास्यस्थितींत परत जाण्यासाठीं त्यांनीं एक
नायक नेमिला, पण तूं क्षमाशील, कृपाळू, दयामय,
मंदक्रोध व अतिकरुणामय देव आहेस; तूं त्यांचा
त्याग केला नाहीं. १८ त्यांनीं ओतींव वासरूं केलें व
ज्या देवानें तुला मिसर देशांतून सोडवून आणिलें व
तुला संताप आणणारीं कामें केलीं तोच हा असें
म्हटलें; १९ तथापि तूं अति दयाळू असल्याकारणानें
त्यांस तूं रानांत सोडून दिलें नाहीं; दिवसा त्यांचा
मार्गदर्शक मेघस्तंभ त्यांजवरून ढळला नाहीं, आणि
रात्रीचा प्रकाश देऊन नीट मार्ग दाखविणारा अग्नि-
स्तंभहि ढळला नाहीं. २० त्याप्रमाणें शिक्षण प्राप्त
व्हावें म्हणून तूं त्यांस आपला सदात्मा दिला; त्यांच्या
तोंडचा मान्ना तूं काढून घेतला नाहीं; आणि त्यांची
तृषा शांत करण्यासाठीं तूं त्यांस पाणी देत राहिलास.
२१ चाळीस वर्षें जंगलांत तूं त्यांचें असें पालनपोषण
केलें कीं त्यांस कशाचीहि वाण पडली नाहीं; त्यांचीं
वस्त्रें जीर्ण झालीं नाहींत; त्यांच्या पायांस सूज आली
नाहीं. २२ मग तूं त्यांस देशोदेशींचे लोक अंकित
करून दिले आणि त्यांच्या चतुःसीमा नेमून दिल्या;
त्याप्रमाणेंच हेशबोनचा राजा सिहोन व बाशानाचा
राजा ओग या दोघांच्या देशांचें वतन त्यांस प्राप्त
झालें. २३ तूं त्यांचे वंशज आकाशांतील ताऱ्यांप्रमाणें
बहुगुणित केले आणि ज्या देशांत जाऊन तुम्ही त्याचें
वतन पावाल म्हणून तूं त्यांच्या पूर्वजांस सांगितलें
होतें त्या देशीं तूं त्यांस नेऊन पोंचविलें. २४ त्या-
प्रमाणेंच त्यांच्या वंशजांनीं त्या देशांत जाऊन त्याचा
ताबा घेतला; तूं त्यांच्यादेखत देशांतले रहिवासी कनानी
यांस पादाक्रांत केलें; त्यांचे राजे व देशचे लोक
यांचें वाटेल तें करावें म्हणून त्यांस तूं त्यांच्या हातीं
दिलें. २५ त्यांनीं तटबंदीचीं नगरें व सुपीक भूमि काबीज
केली, आणि उत्तमोत्तम वस्तूंनीं भरलेलीं घरें, खोद-
लेले हौद, द्राक्षांचे मळे, जैतुनांचे मळे व विपुल फळ-
झाडें यांचा ताबा घेतला; ते खाऊन तृप्त झाले, धष्टपुष्ट
झाले आणि तुझ्या अतिशयित चांगुलपणामुळें सुख
पावले; २६ पण त्यांनीं आज्ञाभंग करून तुजविरुद्ध बंड
केलें; तुझें धर्मशास्त्र त्यांनीं पाठीमागें फेकून दिलें;
तुजकडे त्यांनीं पुनः वळावें असें ज्या तुझ्या संदेष्ट्यांनीं
निक्षून सांगितलें त्यांस त्यांनीं जिवें मारिलें आणि
तुला संतप्त केलें. २७ त्यामुळें तूं त्यांस त्यांच्या
शत्रूंच्या हातीं दिलें; त्यांनीं त्यांस संकटांत घातलें;
तरी आपल्या विपत्काळीं त्यांनीं तुझा धावा केला; तो
तूं स्वर्गांतून ऐकला व तुझ्या दयेच्या बहुत कृत्यांस
अनुसरून त्यांस त्यांच्या शत्रूंच्या हातून सोडविण्या-
साठीं तूं त्यांस सोडविणारे दिले; २८ पण जेव्हांजेव्हां
त्यांस स्वास्थ्य मिळे तेव्हांतेव्हां ते तुझ्यासमोर
दुष्कर्म करीत; यामुळें तूं त्यांस शत्रूंच्या हातीं देत
असस; व ते त्यांजवर सत्ता चालवीत; तरी ते तुज-
कडे वळून तुझा धावा करीत तो तूं स्वर्गांतून ऐकत
असस, आणि तुझ्या दयेच्या कृत्यांस अनुसरून तूं
त्यांस अनेक वेळां मुक्त केलें. २९ त्यांस पुनः
नियमशास्त्राप्रत आणावें म्हणून तूं त्यांस बजावून
सांगितलें तरी त्यांनीं उन्मत्त होऊन तुझ्या आज्ञांचा
अवमान केला आणि जे निर्णय पाळिल्यानें मनुष्य
जीवंत राहतो ते न जुमानितां त्यांनीं पाप केलें; त्यांनीं
आपला खांदा जुवाखालून काढून घेतला; मान ताठ
केली व ते ऐकतनासे झाले. ३० तूं पुष्कळ वर्षें
त्यांची गय केली व आपल्या आत्म्यानें संदेष्ट्यांच्या
द्वारें त्यांस बजावीत आलास; पण त्यांनीं कान दिला
नाहीं म्हणून तूं त्यांस अनेक देशांतील लोकांच्या हातीं
दिलें. ३१ तरी तूं आपल्या दयेच्या बहुत कृत्यांस
अनुसरून त्यांचा पुरा अंत केला नाहीं, त्यांचा त्याग केला
नाहीं, कारण तूं कृपाळू व दयाळू देव आहेस. ३२ तर
आतां हे आमच्या देवा, हे थोर, पराक्रमी व भयावह
देवा, आपला करार व दया कायम राखणाऱ्या देवा,
अश्शुरी राजांच्या काळापासून आजपर्यंत आम्हांस,
आमच्या राजांस, आमच्या अधिपतींस, आमच्या
याजकांस, आमच्या संदेष्ट्यांस, आमच्या वाडवडिलांस
आणि तुझ्या सर्व लोकांस जे कष्ट झाले आहेत ते क्षुल्लक
लेखूं नको. ३३ आम्हांवर जें कांहीं गुदरलें आहे त्याच्या

बाबतींत तूं न्यायशील आहेस; तूं आमच्याशीं सत्यतेनें
वागलास पण आम्हीं दुष्टाई केली आहे. ३४ आमचे
राजे, अधिपति, याजक आणि वाडवडील यांनीं तुझें
नियमशास्त्र पाळिलें नाहीं, आणि आपल्या ज्या आज्ञांच्या
व निर्बंधांच्या योगें तूं त्यांस बजाविलें त्यांकडे त्यांनीं
लक्ष दिलें नाहीं. ३५ त्यांनीं आपल्या राज्यांत तुझी
सेवा केली नाहीं; तूं त्यांचें मोठें कल्याण केलें,
आणि तूं त्यांस विस्तृत व सुपीक भूमि दिली तरीहि
तुझी सेवा त्यांनीं केली नाहीं आणि आपल्या दुष्कर्मांपासून
ते परावृत्त झाले नाहींत. ३६ पाहा, आज आम्ही
दास बनलों आहों; आमच्या पूर्वजांनीं उत्तम उत्पन्न
उपभोगावें म्हणून जो देश त्यांस दिला त्यांत आम्हीं
केवळ दास आहों. ३७ आमच्या पापामुळें जे राजे
तूं आम्हांवर नेमिले आहेत त्यांस या देशाचें पुष्कळ
उत्पन्न मिळत आहे; ते आमच्या देहांवर व आमच्या
गुरांढोरांवर हवी तशी सत्ता चालवीत आहेत; आम्ही
फार संकटांत आहों. ३८ या सर्व कारणास्तव आम्ही
दृढ करार करितों, लिहून देतों, आणि आमचे अधि-
पति, लेवी व याजक हे त्याजवर मोहर करीत आहेत.

१ ज्यांनीं आपली मुद्रा केली ते हे होत:
१० हखल्याचा पुत्र नहेम्या तिर्शाथा (प्रांताधिपति) व
सिद्कीया, २ सराया, अजऱ्या, यिर्मया, ३ पश्हूर,
अमऱ्या, मल्कीया, ४ हट्टूश, शबन्या, मल्लूख, ५ हारिम,
मरेमोथ, ओबद्या, ६ दानीएल, गिन्नथोन, बारूख,
७ मशुल्लाम, अबीया, मियामीन, ८ माझ्या, बिल्गइ,
शमया हे याजक; ९ आणि लेवी: अजन्याचा पुत्र
येशूवा, हेनादादाच्या पुत्रांतला बिन्नुइ, कदमीएल,
१० आणि त्यांचे भाऊ शबन्या, होदीया, कलीता,
पलाया, हनान, ११ मीखा, रहोब, हशब्या,
१२ जक्कूर, शेरेब्या, शबन्या, १३ होदीया, बानी,
बनीनू; १४ लोकांतले मुख्य: परोश, पहथ-मवाब,
एलाम, जात्तू, बानि, १५ बुन्नी, अजगाद, बेबाई,
१६ अदोनीया, बिग्वइ, आदीन, १७ आटेर,
हिज्कीया, अज्जूर, १८ होदीया, हाशूम, बेसाइ,
१९ हारीफ, अनाथोथ, नोबाई, २० मग्पीयाश, मशु-
ल्लाम, हेजीर, २१ मशेजबेल, सादोक, यद्दूवा,
२२ पलट्या, हानान, अनया, २३ होशेया, हनन्या,
हश्शूब, २४ हल्लोहेश, पिल्हा, शोबेक, २५ रहूम,
हशब्ना, मासेया, २६ अहीया, हानान, आनान,
२७ मल्लूख, हारिम व बाना. २८ अवशिष्ट लोकांनीं
म्हणजे याजक, लेवी, द्वारपाल, गायक व नथीनीम यांनीं
आणि देवाचें धर्मशास्त्र पाळावयासाठीं देशोदेशींच्या
लोकांतून जे वेगळे झाले होते त्या सर्वांनीं ज्यांस अक्कल
व समजूत होती अशा आपल्या स्त्रिया, पुत्र व कन्या
यांसह २९ आपले भाऊबंद व महाजन यांच्याशीं
एकचित्त होऊन आणभाक केली कीं जें नियमशास्त्र
देवाचा सेवक मोशे याच्या द्वारें देण्यांत आलें त्याप्रमाणें
आम्ही वर्तूं आणि आमचा प्रभु परमेश्वर याच्या सर्व
आज्ञा, निर्णय व नियम लक्षपूर्वक पाळूं; असें न
केल्यास आम्हांस शाप लागो. ३० आम्ही आमच्या
मुली या देशांतल्या लोकांस देणार नाहीं व त्यांच्या मुली
आमच्या मुलांस करणार नाहीं; ३१ या देशाच्या
लोकांनीं शब्बाथ दिवशीं एकादी वस्तु अगर अन्नसामग्री
विकावयास आणली, तर आम्ही ती त्यांच्याकडून
शब्बाथ दिवशीं किंवा एकाद्या पवित्र दिवशीं विकत
घेणार नाहीं; तर सातव्या वर्षी आमची जमीन आम्ही
पडीत ठेवूं आणि लोकांकडचीं कर्जे वसूल करणें असेल
तें सोडून देऊं. ३२ याशिवाय आम्ही असा एक
नियम करून ठेवितों कीं आम्ही आपल्या देवाच्या
मंदिरांतील उपासनेसाठीं प्रत्येकीं एकतृतीयांश शेकेल
दर वर्षी द्यावा; ३३ समर्पित भाकरी, नित्याचें अन्ना-
र्पण, नित्याचें होमार्पण आणि शब्बाथ, चंद्रदर्शन आणि
नेमिलेले सण यांसंबंधाचीं बलिदानें आणि पवित्र
वस्तु, इस्राएलाच्या प्रायश्चित्तासाठीं पापार्पणें, या सर्वां-
साठीं, आमच्या देवाच्या मंदिराच्या कामीं लागणारा
खर्च आम्हीं द्यावा. ३४ मग याजक, लेवी व इतर
एकंदर लोक अशा आम्हीं सर्वांनीं पुढील कार्यासाठीं
चिठ्या टाकिल्या म्हणजे नियमशास्त्रांत लिहिल्या-
प्रमाणें आमचा देव परमेश्वर याच्या वेदीवर जाळण्या-
साठीं आपल्या पितृकुळांप्रमाणें वर्षानुवर्ष नियमित

समयीं आपल्या देवाच्या मंदिरांत लाकडाचीं अर्पणें
आणावीं. ३५ आपआपल्या जमिनीचा प्रथम उपज व
निरनिराळ्या वृक्षांचीं प्रथम फळें वर्षानुवर्ष परमे-
श्वराच्या मंदिरीं आणावीं; ३६ आणि नियमशास्त्रांत
लिहिल्याप्रमाणें आपले प्रथम जन्मलेले पुत्र, तसेंच
आमच्या गुराढोरांचे व शेरडांमेंढरांचे प्रथम जन्मलेले हे
सर्व आमच्या देवाच्या मंदिरांत सेवा करणाऱ्या याजकां-
कडे घेऊन यावे; ३७ आणि आपल्या मळलेल्या
पिठाचा पहिला उंडा, समर्पित अंशाचीं अर्पणें, सर्व
प्रकारच्या झाडांचीं फळें, द्राक्षारस व तेल हीं याजकां-
कडे देवाच्या मंदिराच्या कोठड्यांत आणावीं; आणि
आमच्या जमिनीच्या उत्पन्नाचा दशमांश लेव्यांकडे न्यावा;
कारण लेवी सर्व नगरांतून आमच्या शेतीच्या उत्पन्नाचा
दशमांश घेत असतात. ३८ लेवी दशमांश घेतील
तेव्हां त्यांच्याबरोबर अहरोनाच्या वंशांतला कोणी
याजक असावा, आणि लेव्यांनीं दशमांशाचा दशमांश
आमच्या देवाच्या मंदिराच्या कोठड्यांत म्हणजे
भांडारांत पोंचता करावा. ३९ इस्राएल लोक व
लेव्यांचे वंशज यांनीं धान्य, द्राक्षारस व तेल यांचें
समर्पित अंशाचें अर्पण, पवित्रस्थानाचीं पात्रें, सेवा
करणारे याजक, द्वारपाळ व गायक असतात त्या
कोठड्यांत आणावें; आणि आम्हीं आपल्या देवाचें
मंदिर सोडूं नये.

१ लोकांचे अधिपति यरुशलेमांत राहत
११ असत; बरकड लोकांपैकीं दहांतल्या एकानें
पवित्र नगर यरुशलेम येथें राहावें आणि नऊ
जणांनीं इतर नगरांत वस्ती करावी हें ठरविण्यासाठीं
त्यांनीं चिठ्या टाकिल्या. २ जे स्वसंतोषानें यरुश-
लेमांत राहण्यास कबूल झाले त्या सर्वांस लोकांनीं धन्य
म्हटलें. ३ यरुशलेमांत राहणारे प्रांतांचे प्रमुख हेच
होत; पण इस्राएल लोक, याजक, लेवी, नथीनीम व
शलमोनाच्या सेवकांचे वंशज यरुशलेमांत व यहूदांतील
आपआपल्या नगरांत व वतनांत राहत होते. ४ यरुश-
लेमांत कांहीं यहूदी व कांहीं बन्यामिनी राहत होते.
यहूदाचे वंशज हे: पेरेसाच्या संततीपैकीं अथाया बिन
उज्जीया बिन जखऱ्या बिन अमऱ्या बिन शफट्या बिन
महललेल; ५ मासेया बिन बारूख बिन कोल-होजे बिन
हजाया बिन अदाया बिन योयारीब बिन जखऱ्या बिन
शिलोनी. ६ पेरेसाचे जे वंशज यरुशलेमांत राहत होते
ते सर्व चारशें अडसष्ट वीर पुरुष होते; ७ आणि बन्या-
मिनाचे वंशज: सल्लू बिन मशुल्लाम बिन योएद बिन पदाया
बिन कोलाया बिन मासेया बिन ईथीएल बिन यशाया
८ आणि त्याच्यामागून गब्बई व सल्लै यांचे वंशज
नवशें अठ्ठावीस होते. ९ यांचा अधिकारी जिख्रीचा पुत्र
योएल होता, आणि हसनूवाचा पुत्र यहूदा नगरचा
दुय्यम अधिकारी होता. १० याजकांतले: यदया बिन
योयारीब व याखीन, ११ सराया बिन हिल्कीया बिन
मशुल्लाम बिन सादोक बिन मरायोथ बिन अहीटूब हा
देवमंदिराचा अधिकारी होता; १२ आणि त्यांचे जे
भाऊबंद मंदिरांतलें काम करीत ते आठशें बावीस
होते; अदाया बिन यहोराम बिन पलल्या बिन अम्सी
बिन जखऱ्या बिन पश्हूर बिन मल्कीया; १३ आणि
त्याचे भाऊबंद पितृकुळांचे प्रमुख दोनशें बेचाळीस
आणि अमश्शइ बिन अजरेल बिन अहजई बिन मशि-
ल्लेमोथ बिन इम्मेर; १४ आणि त्यांचे भाऊबंद एकशें
अठ्ठावीस बलवान् वीर; आणि त्यांचा अधिकारी हग्गदोली-
मचा पुत्र जब्दीएल हा होता. १५ आणि लेव्यांतले शमाया
बिन हश्शूब बिन अज्रीकाम बिन हशब्या बिन बुन्नी;
१६ आणि लेव्यांच्या मुख्यांपैकीं शब्बथई व योजाबाद हे
देवाच्या मंदिराच्या बाहेरच्या कामावर होते; १७ आणि
प्रार्थनेच्या वेळीं ईशोपकारस्मरण आरंभिण्याच्या कामीं
मत्तन्या बिन मीखा बिन जब्दी बिन आसाफ हा मुख्य
होता व बकबुक्या आपल्या भाऊबंदांतला दुसरा होता;
आणि अब्दा बिन शम्मूवा बिन गालाल बिन यदूथून हाहि
होता. १८ पवित्र नगरांतले सर्व लेवी दोनशें चौऱ्यायशीं
होते. १९ द्वारपाळ अक्कूब, तल्मोन व दरवाजे
राखणारे त्यांचे भाऊबंद एकशें बहात्तर होते. २० बरकड
इस्राएल लोक, याजक व लेवी यहूदाच्या सर्व
नगरांत आपआपल्या वतनांत होते; २१ पण
नथीनीम ओफेलांत राहत; सीहा व गिश्पा हे नथी-

नीमांवर नेमिले होते. २२ उज्जी बिन बानी
बिन हशब्या बिन मत्तन्या बिन मीखा हा यरुशले-
मांतल्या लेव्यांचा अधिकारी होता; आसफाच्या वंशजां-
तले जे गाणारे ते देवाच्या मंदिरांतील कामावर होते;
२३ कारण त्यांच्यासंबंधानें राजाची आज्ञा होती व
रोजच्या जरूरीप्रमाणें गाणाऱ्यांची व्यवस्था ठरली होती.
२४ यहूदाचा पुत्र जेरह याच्या वंशजांतला मशेजबेल
याचा पुत्र पथह्या लोकांसंबंधाच्या सर्व गोष्टींच्या
बाबतींत राजाच्या हाताशीं होता. २५ खेडींपाडीं व
त्यांच्या शेतवाड्या यांविषयीं: यहूदाच्या वंशांतल्या
कित्येकांनीं किर्याथ-अर्बांत व त्याच्या खेड्यांत, दिबोनांत
व त्याच्या खेड्यांत, आणि यकब्सेलांत व त्याच्या
खेड्यांत, २६ येशूवांत, मोलादांत व बेथ-पलेतांत,
२७ हसर-शूवालांत, बैरशेबांत व त्याच्या खेड्यांत,
२८ सिक्लगांत, मकोनांत व त्याच्या खेड्यांत,
२९ एन्-रिम्मोनांत, सारयांत, यर्मूथांत, ३० जानोहांत,
अदुल्लामांत व त्याच्या खेड्यांत, लाखीशांत व त्याच्या
शेतवाड्यांत, अजेकांत व त्याच्या खेड्यांत वस्ती केली;
त्यांनीं बैर-शेबापासून हिन्नोमाच्या खोऱ्यापर्यंत वस्ती
केली. ३१ गेबांतले बन्यामिनाचे वंश मिखमाशांत
व अयांत, बेथेलांत व त्याच्या खेड्यांत, ३२ अनाथो-
थांत, नोबांत, अनन्यांत, ३३ हासोरांत, रामांत,
गित्तइमांत, ३४ हादीदांत, सबोइमांत, नबल्लाटांत,
३५ लोदांत व कारागिरांच्या खोऱ्यांतल्या ओनांत
वस्ती केली. ३६ लेव्यांपैकीं यहूदांतलीं कांहीं प्रकरणें
बन्यामिनाकडे होतीं.

१२ १ शल्तीएलाचा पुत्र जरुब्बाबेल व येशूवा
यांजबरोबर जे याजक व लेवी वर आले ते हे:
सराया, यिर्मया, एज्रा, २ अमऱ्या, मल्लूख,
हत्तुश, ३ शखन्या, रहूम, मरेमोथ, ४ इद्दो,
गिन्नथोई, अबीया, ५ मियामीन, माद्या, बिल्गा,
६ शमया, योयारीब, यदया, ७ सल्लु, आमोक,
हिल्कीया व यदया; हे येशूवाच्या काळीं याजकांतले
व त्यांच्या बांधवांतले मुख्य होते. ८ लेवी: येशूवा,
बिन्नुइ, कदमीएल, शेरेब्या, यहूदा, मतन्या व त्याचे
भाऊबंद स्तुतिगायनांच्या कामावर होते; ९ आणि
त्यांचे भाऊबंद बकबुक्या व उन्नो त्यांजबरोबर पहाऱ्यांत
होते. १० येशूवास योयाकीम झाला, योयाकी-
माला एल्याशीब झाला, एल्याशीबाला योयाद झाला,
११ योयादास योनाथान झाला, व योनाथानास
यद्दवा झाला. १२ योयाकीमाच्या काळीं याजक
पितृकुळांतले मुख्य होते ते हे: सरायापासून
मराया, यिर्मयापासून हनन्या, १३ एज्रापासून
मशुल्लाम, अमऱ्यापासून यहोहानान, १४ मल्लूखीपासून
योनाथान, शबन्यापासून योसेफ, १५ हारिमापासून
अद्ना, मरायोथापासून हेलकइ, १६ इद्दोपासून
जखऱ्या, गिन्नथोन्नापासून मशुल्लाम, १७ अबीयापासून
जिख्री, मिन्यामीनापासून, मोवद्यापासून पिल्तय,
१८ बिल्गापासून शम्मूवा, शमयापासून यहोनाथान,
१९ योयारीबापासून मत्तनय, यदयापासून उज्जी,
२० सल्लयापासून कल्लय, आमोकापासून एबेर,
२१ हिल्कीयापासून हशब्या व यदायापासून नथनेल.
२२ एल्याशीब, योयादा, योहानान व यद्दवा यांच्या
काळीं लेवी आणि दारयावेश पारसाच्या कारकीर्दीतले
याजक हे त्यांच्या पितृकुळांचे मुख्य होते.
२३ लेव्यांचे वंशज, आपआपल्या पितृकुळांचे मुख्य
इतिहासाच्या पुस्तकांत एल्याशिबाचा पुत्र योहानान
याच्या काळापर्यंत नमूद केले होते; २४ आणि
लेव्यांतले मुख्य हशब्या, शेरेब्या व कदमीएलाचा पुत्र
येशूवा व त्यांच्यासमोर त्यांचे भाऊबंद असे मेळ्यानें
देवाचा मनुष्य दावीद याच्या आज्ञेप्रमाणें स्तवन व
ईशोपकारस्मरण करावयास होते. २५ मत्तन्या, बकबुक्या,
ओबद्या, मशुल्लाम, तल्मोन व अक्कूब हे द्वारपाळ
दरवाजांच्या कोठ्यांचें रक्षण करीत असत; २६ हे
योयाकीम बिन येशूवा बिन योसादाक याच्या वेळीं
व नहेम्या अधिकारी व लेखक एज्रा याजक
यांच्या काळीं होते.

२७ यरुशलेमाच्या कोटाच्या प्रतिष्ठापनेच्या समयीं
लेव्यांनीं आनंद व धन्यवाद करून झांजा, सारंग्या
व वीणा वाजवून आणि गाऊन तो प्रसंग साजरा

करावा म्हणून त्यांस यरुशलेमांत पोंचविण्यासाठीं त्यांच्या-
त्यांच्या स्थानांतून हुडकून काढिलें. २८ यरुशलेमाच्या
चोहोंकडल्या प्रांतांतून, नटोफातींच्या खेड्यांपाड्यांतून,
२९ बेथ-गिल्गाल येथून आणि गेबा व अज-मावेथ
येथल्या शेतवाडींतून गायकांचे वंशज एकवट झाले;
त्यांनीं यरुशलेमाच्या आसपास खेडीं वसविलीं होतीं.
३० मग याजक व लेवी यांनीं स्वतांस शुचिर्भूत
करून लोकांची, वेशींची व कोटाची शुद्धि केली.
३१ मीं यहूदाच्या सरदारांस कोटावर चढविलें
आणि त्यांच्या दोन टोळ्या केल्या; त्या स्तोत्रें
गात मिरवत चालल्या; त्यांची एक टोळी दक्षिण
दिशेनें म्हणजे केरवेशीकडे चालली; ३२ आणि
तिच्यामागून होशया, यहूदाचे अर्धे अधिकारी,
३३ अजऱ्या, एज्रा, मशुल्लाम, ३४ यहूदा, बन्यामीन,
शमया, यिर्मया, ३५ व कित्येक याजकांचे पुत्र करणे
घेऊन चालले; जखऱ्या बिन योनाथान बिन शमया
बिन मत्तन्या बिन मिखाया बिन जक्कूर बिन आसाफ,
३६ आणि त्याचे भाऊबंद शमया, अजरेल, मिललई,
गिललई, माई, नथनेल, यहूदा व हनानी हे देवाचा
मनुष्य दावीद याचीं वाद्यें घेऊन चालले आणि
त्यांच्यापुढें एज्रा शास्त्री चालला; ३७ ते झरावेशी-
कडून नीट दावीदपुराच्या पायऱ्यांवरून कोटाच्या
चढणीवर दाविदाच्या मंदिराच्या वरल्या भागाकडून
पूर्वेस पाणीवेशीपर्यंत गेले. ३८ स्तोत्रें म्हणणारी व
मिरवत जाणारी दुसरी टोळी त्यांस मिळावयास पुढें
चालली, आणि तिच्यामागून मी व अर्धे लोक कोटावरील
भट्टीबुरुजावरून रुंद कोटापर्यंत, ३९ आणि
एफ्राईम वेशीपासून जुन्या वेशीवरून मत्स्यवेस,
हनानेल बुरूज व हमया बुरूज यावरून मेंढेवेशी-
पर्यंत गेलों; गारद्यांच्या वेशींत ते जाऊन उभे राहिले.
४० अशा स्तोत्रें म्हणणाऱ्या दोन्ही टोळ्या देवाच्या
मंदिरांत उभ्या राहिल्या, मी व मजबरोबर अर्धे
अधिपतिहि उभे राहिले; ४१ याजक, एल्याकीम,
मासेया, मिन्यामीन मीखाया, एल्योएनाई, जखऱ्या
व हनन्या यांनीं करणे हातीं घेतले; ४२ आणि
मासेया, शमाया, एलाजार उज्जी, यहोहानान,
मल्खीया, एलाम व एजेर यांनींहि करणे घेतले;
गायकांनीं उंच स्वरानें गाइलें; यिज्रह्या त्यांचा
अध्यक्ष होता. ४३ त्या दिवशीं लोकांनीं मोठे यज्ञ
करून आनंद केला, कारण देवानें त्यांस आनंदानें
परिपूरित केलें होतें; बायकामुलांनींहि आनंद केला;
यरुशलेमाचा आनंदध्वनि दूर जाऊन पोहंचला.

४४ याजक व लेवी यांचे ठरलेले वांटे नगरो-
नगरींच्या शेतांप्रमाणें गोळा करावे म्हणून त्या दिवशीं
भांडारें, परमेश्वराप्रीत्यर्थ समर्पित अंश, प्रथम फळें
व दशमांश यांच्या कोठड्यांवर लोक नेमण्यांत आले;
कारण याजक व लेवी हे हजर राहिल्याकारणानें
यहूदास आनंद झाला होता. ४५ दाविदाच्या व त्याचा
पुत्र शलमोन याच्या आज्ञेप्रमाणें ते आपल्या देवाच्या
मंदिराचें व शुद्धीकरणाचें काम करीत; तसेंच गायक व
द्वारपाळ हेंहि करीत. ४६ प्राचीन काळीं म्हणजे दावीद
व आसाफ यांच्या काळीं एक मुख्य गायक व देवाचीं
स्तुतिस्तोत्रें यांची योजना केली होती. ४७ जरूब्बाबेल
व नहेम्या यांच्या काळीं सर्व इस्राएल लोक गायकांस
व द्वारपाळांस दर दिवसाचा शिधा देत असत; ते
लेव्यांचे वांटे काढून ठेवीत आणि लेवी अहरोनाच्या
वंशजांचे वांटे काढून ठेवीत.

१३ १ त्या दिवशीं मोशाचा ग्रंथ लोकांस
वाचून दाखविण्यांत आला; त्यांत हें लिहिलेलें
आढळलें कीं अम्मोनी अथवा मवाबी यांस
देवाच्या मंडळींत येण्यास मनाई आहे; २ कारण
ते अन्नपाणी घेऊन इस्राएल लोकांस सामोरे आले
नाहींत, पण उलट शाप द्यावा म्हणून बलामास त्यांनीं
दक्षिणा देऊन बोलाविलें; तरी आमच्या देवानें त्या
शापाचा आशीर्वाद केला. ३ नियमशास्त्राचें हें वचन
ऐकून त्यांनीं इस्राएलांतून मिश्र समुदाय निराळा केला.

४ यापूर्वी एल्याशीब याजक, जो देवाच्या कोठड्यांचा
रक्षक असून तोबियाचा आप्त होता, ५ त्यानें
तोबियासाठीं एक मोठी कोठडी तयार केली होती; त्या
कोठडींत पूर्वी अन्नबलीची सामग्री, ऊद, पात्रें आणि

लेवी, गायक व द्वारपाळ यांस शास्त्राज्ञेप्रमाणें देण्याचें
धान्य, द्राक्षारस व तेल यांचे दशमांश, व याजकांस
द्यावयाचीं समर्पित अंशांचीं अर्पणें हीं ठेवीत असत.
६ एवढा सगळा वेळ मी यरुशलेमांत राहत नव्हतों;
बाबेलचा राजा अर्तहशस्त याच्या कारकीर्दीच्या बत्ति-
साव्या वर्षी मी त्याजकडे गेलों आणि मग कांहीं दिवसांनीं
मीं राजाकडे रजा मागितली; ७ नंतर मी यरुशलेमास
आलों तेव्हां एल्याशिबानें तोबियासाठीं देवाच्या
मंदिराच्या अंगणांत एक कोठडी तयार केली आहे
ही गैर गोष्ट मला कळली. ८ मला त्याचें फार
वाईट वाटून मीं तोबियाचा सगळा संसार कोठडी-
बाहेर फेकून दिला. ९ मग माझ्या आज्ञेवरून
त्यांनीं त्या कोठड्या शुद्ध केल्या व मीं देवाच्या
मंदिराचीं पात्रें, अन्नबलींची सामग्री व ऊद हीं पुनः
त्यांत ठेविलीं. १० मला आणखी असें कळलें कीं लेव्यांस
मुशाहिरा न मिळाल्यामुळें कामावरले लेवी व गायक
आपआपल्या शेतावर पळून गेले. ११ मग मी अधि-
पतींशीं वाद करून म्हणालों कीं लोकांनीं देवाचें मंदिर कां
सोडून दिलें आहे ? नंतर मीं त्यांस एकवट करून त्यांच्या
पूर्वीच्या ठिकाणीं नेमिलें. १२ मग सर्व यहूदी लोक
धान्य, द्राक्षारस व तेल यांचे दशमांश भांडारांत पावते
करूं लागले; १३ आणि मीं शलेम्या याजक, सादोक
शास्त्री आणि लेव्यांपैकीं पदाया ह्यांस भांडारावर भांडारी
नेमिलें; त्यांच्या हाताखालीं हनान बिन जक्कर बिन
मतन्या हा होता; हे भरंवशाचे होते; त्यांच्या भाऊ-
बंदांस वांटे करून देण्याचें काम मीं त्यांजकडे सोंपविलें.
१४ हे माझ्या देवा, या कामगिरीबद्दल माझें स्मरण ठेव;
माझ्या देवाचें मंदिर व त्यांतील उपासना यांसंबंधानें
चांगलीं कामें मीं केलीं आहेत, तीं पुसून टाकूं नको.

१५ त्या काळीं यहूदांत कांहीं लोक शब्बाथ
दिवशीं द्राक्षाकुंडांत द्राक्षें तुडवीत असलेले माझ्या दृष्टीस
पडले. ते धान्याच्या पेंढ्या आणून गाढवांवर लादीत;
त्याप्रमाणेंच द्राक्षारस, द्राक्षें, अंजीर, व इतर पदार्थ यांचे
बोजे शब्बाथ दिवशीं ते यरुशलेमांत घेऊन येत. त्यांनीं
अन्नसामग्रीची विक्री चालविली त्याच दिवशीं त्यांची
मीं कानउघाडणी केली. १६ तेथें सोरकरहि राहत
असत; ते मासे व नाना प्रकारचे पदार्थ आणून शब्बाथ
दिवशीं यहूदी लोक व यरुशलेमकर यांस विकीत असत.
१७ मग यहुदाच्या सरदार मंडळीशीं वाद करून मी
म्हणालों, तुम्ही असलें दुष्कर्म करून शब्बाथ दिवस
पवित्र असा पाळीत नाहीं हें काय ? १८ तुमच्या वाड-
वडिलांनींहि असेंच केलें ना ? त्यामुळें देवानें आम्हांवर
व या नगरावर हें सर्व अरिष्ट आणिलें ना ? तुम्ही
शब्बाथ दिवस पवित्र न मानून इस्राएलावर आणखी
अरिष्ट आणावयास पाहतां. १९ शब्बाथ सुरू होण्यापूर्वी
यरुशलेमाच्या वेशींच्या आसपास अंधार पडूं लागे;
म्हणून मीं आज्ञा केली कीं वेशींचे दरवाजे लावून घ्यावे
आणि शब्बाथ संपेपर्यंत ते उघडूं नयेत; शब्बाथ
दिवशीं कांहींएक बोजा आंत आणतां येऊं नये म्हणून
मीं आपले कांहीं चाकर वेशींवर ठेविले. २० एक-
दोन वेळां व्यापाऱ्यांस व हरतऱ्हेच्या मालाची विक्री
करणाऱ्यांस यरुशलेमाच्या बाहेर राहावें लागलें.
२१ तेव्हां मीं त्यांस दरडावून म्हटलें, तुम्ही कोटासमोर
कां उतरलां ? पुनः असें केल्यास तुमच्यावर मी हात
टाकीन. तेव्हांपासून ते पुनः शब्बाथ दिवशीं आले
नाहींत. २२ मग मीं लेव्यांस आज्ञा केली कीं शब्बाथ
दिवस पवित्र मानून पाळावा म्हणून तुम्ही शुद्ध होऊन
वेशींवर पहारा करण्यास येत जा. हे माझ्या देवा,
माझ्या हितार्थ माझ्या याहि कामगिरीचें स्मरण ठेव,
आणि तुझ्या विपुल दयेस अनुसरून माझा बचाव कर.

२३ त्या काळीं अश्दोदी, अम्मोनी व मवाबी
स्त्रियांशीं लग्नें केलेले यहूदी लोक मला आढळले;
२४ त्यांचीं मुलेंबाळें अश्दोदी भाषा अर्धवट बोलत,
त्यांस यहूदी भाषा बोलतां येत नसे, ते आपआपल्या
जातींची मिश्र भाषा बोलत. २५ मीं त्या लोकांशीं
वाद केला, मीं त्यांस शिव्याशाप दिले, त्यांतल्या कित्येकांस
मार दिला आणि त्यांचे केस उपटून देवाची शपथ
घेऊन त्यांस असें म्हणावयास लाविलें कीं आम्ही इतःपर
आमच्या कन्या त्यांच्या पुत्रांस देणार नाहीं आणि
त्यांच्या कन्या आम्ही व आमचे पुत्र करणार नाहीं.

२६ इस्राएलाचा राजा शलमोन अशाच प्रकारच्या
गोष्टींनीं पापमग्न झाला होता ना ? पुष्कळ राष्ट्रांत
त्याच्यासारखा कोणी राजा झाला नाहीं; तो देवाचा
आवडता असून त्याला सर्व इस्राएलावर राजा केलें होतें,
तरी त्यालाहि अन्य जातींच्या स्त्रियांनीं पापांत पाडिलें.
२७ तुमचें ऐकून आम्हीं अन्य जातींच्या स्त्रियांशीं विवाह
करून आमच्या देवाचे अपराधी व्हावें व घोर पातक
करावें काय ? २८ मुख्य याजक एल्याशीब याचा पुत्र
योयादा याच्या पुत्रांपैकीं एक जण सनबल्लट होरोनी
याचा जांवई होता; मीं त्यास आपल्याजवळून हाकून
लाविलें. २९ हे माझ्या देवा, त्यांनीं याजकपद भ्रष्ट
केलें आहे आणि याजकवृत्तीचा व लेवीवृत्तीचा
करार मोडिला आहे, म्हणून त्यांची आठवण ठेव.
३० या प्रकारें मीं त्यांस सगळ्या परकीयांपासून शुद्ध
करून प्रत्येक याजकाची व लेव्याची पाळी आणि अनुक्रम
हीं ठरवून दिलीं; ३१ मग लाकडाचें अर्पण व प्रथम उपज
आणण्याची वेळ मीं ठरवून दिली. हे माझ्या देवा,
माझ्या हितार्थ माझें स्मरण ठेव.

# एस्तेर



१ अहश्वेरोश राजाच्या कारकीर्दींत पुढील
1 वृत्त घडलें; त्याचें साम्राज्य हिंदिस्तानापासून कुशा-
पर्यंत होतें; ज्याचा अंमल एकशें सत्तावीस प्रांतांवर
होता तोच हा अहश्वेरोश. २ अहश्वेरोश राजानें शूशन
राजवाड्यांतल्या आपल्या सिंहासनावर बसल्या-
नंतर ३ आपल्या कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षी
आपले सर्व सरदार व सेवक यांस मेजवानी
दिली; पारस व मेदय यांचे सेनापति, प्रांतोप्रांतींचे
महाजन व सरदार त्याजपुढें हजर झाले; ४ त्यांस
त्यानें बहुत दिवसपर्यंत म्हणजे एकशें ऐशीं दिवसपर्यंत
आपल्या वैभवशाली राज्याची दौलत आणि आपल्या
श्रेष्ठ प्रतापाचें वैभव दाखविलें. ५ एवढे दिवस
गेल्यावर राजानें शूशन राजवाड्यांत आलेल्या
लहानथोर लोकांस राजमंदिराच्या बागेच्या पटांगणांत
सात दिवस मेजवानी दिली; ६ तेथील पडदे पांढऱ्या,
हिरव्या, व निळ्या रंगांचे होते; हे पडदे तलम
सणाच्या व जांभळ्या रंगाच्या दोऱ्यांनीं चांदीच्या
कड्यांमध्यें अडकवून संगमरवरी खांबांस लाविले होते;
तेथील मंचक सोन्याचांदीचे असून तांबड्या, पांढऱ्या,
पिवळ्या व काळ्या संगमरवरी पाषाणांच्या फरशीवर
ठेविले होते. ७ त्या मेजवानींत राजास पिण्याला योग्य
असा द्राक्षारस तऱ्हेतऱ्हेच्या सुवर्णपात्रांत घालून
राजाच्या औदार्यानुसार लोकांस विपुल पिण्यास देण्यांत
आला. ८ हें पिणें नियमानुसार असे; कोणी कोणास
आग्रह करीत नसे; राजानें आपल्या मंदिराच्या
सर्व कारभाऱ्यांस आज्ञा केली होती कीं त्यांनीं
पाहुण्यांची तब्येत संभाळावी. ९ वश्ती राणीनेंहि
राजा अहश्वेरोश याच्या राजमंदिरांत स्त्रियांस मेजवानी
दिली. १० सातव्या दिवशीं द्राक्षारसानें राजाचें मन
उल्लासयुक्त झालें असतां त्यानें महूमान, बिज्था,
हरबोना, बिग्था, अबग्था, जेथर व कर्खस असे जे
सात खोजे त्याच्या तैनातीस असत त्यांस आज्ञा केली
कीं ११ वश्ती राणीचें सौंदर्य देशोदेशींच्या लोकांस व
सरदारांस दाखवावें म्हणून तिला राजमुकुट घालून
आपल्यापुढें घेऊन यावें; कारण ती फार देखणी होती.
१२ खोजांच्या द्वारें राजाची आज्ञा आली तरी वश्ती
राणीनें येण्याचें नाकारिलें; त्यावरून राजास फार
क्रोध येऊन तो संतप्त झाला. १३ मग राजानें कालज्ञ

पंडितांस विचारिलें; (तो राजा सर्व न्यायशास्त्री व
धर्मज्ञ यांची अशी संभावना करीत असे;) १४ त्याज-
जवळ कर्शना, शेथार, अदमाथा, तर्शीश, मेरेस,
मर्सना व ममुखान हे पारस व मेदय येथले सात सर-
दार असत ते राजाच्या हुजुरास राहून राज्यांत त्यांस
पहिला मान असे; १५ राजानें त्यांस विचारिलें की
अहश्वेरोशानें खोजांच्या द्वारें केलेली आज्ञा वश्ती
राणीनें मानिली नाहीं तर आम्हीं कायदेशीर रीतीनें
तिचें काय करावें? १६ तेव्हां ममुखानानें राजास व
सरदारांस उत्तर केलें, वश्ती राणीनें हा अपमान
केवळ राजाचा केला आहे असें नाहीं, तर सर्व सर-
दारांचा व अहश्वेरोश राजाच्या सर्व प्रांतांत राह-
णाऱ्या एकंदर लोकांचाहि केला आहे. १७ राणीच्या
या कृत्याची खबर सर्व स्त्रियांस लागेल आणि राजा
अहश्वेरोश यानें वश्ती राणीस आपल्यासमोर येण्यास
आज्ञा केली असूनहि ती आली नाहीं असें त्यांस
कळेल तेव्हां त्या आपआपल्या पतींस तुच्छ मानूं
लागतील. १८ आज राणीचें हें कृत्य पारस व मेदय
यांच्या ज्या सरदारस्त्रियांनीं ऐकलें आहे त्या राजाच्या
सरदारांस असेंच म्हणूं लागतील; तसें फार अपमान
व संताप उत्पन्न होईल. १९ राजाची मर्जी असल्यास
त्यानें एक राजकीय फर्मान फिरवावें आणि कांहीं फेर-
बदल होऊं नये म्हणून पारसी व मेदय यांच्या कायद्यांत
असें लिहून ठेवावें कीं वश्तीनें राजा अहश्वेरोश याच्या-
समोर पुनः येऊं नये आणि तिच्याहून कोणी चांगली
असेल तिला पट्टराणीचें पद मिळावें. २० राजाची
ही आज्ञा त्याच्या साऱ्या विस्तीर्ण साम्राज्यांत जाहीर
होईल तेव्हां सर्व बायका आपल्या कनिष्ठ अगर थोर
नवऱ्यांस मान देतील. २१ हें म्हणणें राजास व सर-
दारांस पटलें आणि ममुखानाच्या सांगण्याप्रमाणें राजानें
केलें; २२ त्यानें आपल्या राज्यांतील सर्व प्रांतांतून
त्या त्या प्रांताच्या लिपींत व त्या त्या राष्ट्रांच्या भाषांत
पत्रें पाठविलीं कीं प्रत्येक मनुष्यानें आपल्या घरांत
सत्ता चालवावी, आणि ही आज्ञा आपल्या लोकांच्या
भाषेंत प्रसिद्ध करावी.

२ १ यानंतर अहश्वेरोश राजाचा राग शमला,
तेव्हां त्यास वश्तीनें काय केलें होतें व त्यामुळें
तिच्याविरुद्ध काय ठराव झाला होता याचें स्मरण
झालें. २ मग त्याची सेवाचाकरी करणारे त्याचे
सेवक त्यास म्हणाले, राजासाठीं तरुण व सुंदर कुमारींचा
शोध करावा; ३ राजानें आपल्या सर्व प्रांतांत
अमलदार नेमावे; त्यांनीं सर्व सुंदर व तरुण कुमारी
शूशन वाड्यांतील अंतःपुरांत जमा करून राजस्त्रियांचा
रक्षक खोजा जो हेगे त्याच्या स्वाधीन कराव्या आणि
त्यांच्या शुद्धतेकरितां जरूर असलेलीं साहित्यें त्यांस
द्यावीं; ४ मग त्यांपैकीं जी कुमारी राजाच्या मनास
येईल ती वश्तीच्या ठिकाणीं राजाची पट्टराणी व्हावी.
ही गोष्ट राजास पसंत पडून त्याप्रमाणें त्यानें केलें.

५ शूशन राजवाड्यांत मर्दखय बिन याईर बिन
शिमई बिन कीश या नांवाचा एक बन्यामिनी यहूदी
होता; ६ बाबेलचा राजा नबुखद्नेस्सर यानें यहूदाचा
राजा यखन्या याजबरोबर जे लोक यरुशलेमाहून
पकडून नेले होते त्यांपैकीं हा एक होता. ७ त्यानें
आपल्या चुलत्याची कन्या हदस्सा ऊर्फ एस्तेर हिचें
पालनपोषण केलें होतें; तिला आईबाप नव्हते, ती
मुलगी सुंदर व रूपवती होती; तिचे आईबाप मेल्यावर
मर्दखयानें तिला स्वतःच्या मुलीप्रमाणें संभाळिलें होतें.
८ राजाची आज्ञा व त्याचा ठराव प्रसिद्ध झाल्यावर बहुत
कुमारी शूशन राजवाड्यांत हेगेच्या हवालीं करण्यांत
आल्या; एस्तेर हिलाहि राजमंदिरांतील स्त्रियांचा
रक्षक हेगे याच्या ताब्यांत दिलें. ९ ती तरुण स्त्री
त्याला पसंत पडली व तो तिजवर प्रसन्न झाला; त्यानें
कांहींएक विलंब न लावितां तिच्या शुद्धतेच्या वस्तु,
तिचे भोजनपदार्थ आणि तिला साजतील अशा सात
सख्या राजवाड्यांतून दिल्या, आणि तिला व तिच्या
सख्यांना घेऊन बेगम अंतःपुरांत सर्वांहून उत्तम
जागीं ठेवावयास दिलें. १० एस्तेरेनें आपले लोक
सांगितले नाहीं; तिनें हें सांगूं नये असें मर्दखयानें
तिला बजावून सांगितलें होतें. ११ एस्तेर कशी आहे
व तिचें काय होणार हें समजण्यासाठीं मर्दखय

रोजच्या रोज अंतःपुराच्या अंगणासमोर फेऱ्या घालीत
असे. १२ स्त्रियांसंबंधाच्या ठरविलेल्या नियमाप्रमाणें
बारा महिनेपर्यंत सर्व कांहीं उपचार झाल्यावर एकेएका
कुमारीची अहश्वेरोश राजाकडे जाण्याची पाळी आली.
त्यांच्या शुद्धीकरणाची रीत म्हटली म्हणजे त्यांस
गंधरसाचें तेल सहा महिने व सुगंधी द्रव्यें सहा महिने
लावीत असत; शिवाय इतर शुद्धतेच्या वस्तु त्यांस लावीत
असत. १३ कुमारीनें राजाकडे जाण्याचा प्रकार
असा: जें कांहीं ती मागे तें तिला अंतःपुरांतून राज-
मंदिरांत जाण्यासाठीं देण्यांत येई; १४ संध्याकाळीं ती
जात असे, आणि सकाळीं ती दुसऱ्या अंतःपुरांत उप-
पत्नींचा रक्षक राजाचा खोजा शाशगज याच्या देखरेखी-
खालीं जाई; राजानें तिजवर प्रसन्न होऊन तिचें
नांव घेऊन बोलाविल्यावांचून ती पुनरपि त्याजकडे
जात नसे. १५ मर्दखयाचा चुलता अबीहइल याची कन्या
एस्तेर, जिला मर्दखयानें मुलगी म्हणून पाळिलें होतें,
तिची राजापाशीं जाण्याची पाळी आली तेव्हां स्त्रियांचा
रक्षक राजाचा खोजा हेगे यानें जें तिला देण्याचें
ठरविलें होतें त्याहून अधिक कांहीं तिनें मागितलें
नाहीं. ज्यानें ज्यानें एस्तेरेस पाहिलें त्या सर्वांची तिज-
वर कृपादृष्टि झाली. १६ ही एस्तेर अहश्वेरोश राजाच्या
कारकीर्दीच्या सातव्या वर्षी दहाव्या महिन्यांत म्हणजे
तेबेथ महिन्यांत राजमंदिरीं राजाकडे आली. १७ राजानें
एस्तेरेवर इतर सर्व स्त्रियांहून अधिक प्रीति केली
आणि वरकड सर्व कुमारींपेक्षां तिजवर त्याचा अनुग्रह
व कृपादृष्टि विशेष झाली. त्यानें तिच्या मस्तकीं राजमुकुट
घातला व वश्तीच्या जागीं तिला राणी केलें. १८ मग
राजानें सर्व सरदार व सेवक यांस एस्तेरेच्या निमित्तानें
मोठी मेजवानी दिली; प्रांतोप्रांतीच्या लोकांचे कर माफ
केले आणि आपल्या औदार्यास शोभणारीं इनामें
दिलीं. १९ कुमारी दुसऱ्यांदा एकवट झाल्या तेव्हां
मर्दखय राजद्वारीं बसला होता. २० त्या वेळी एस्तेरेनें
आपलें गणगोत सांगितलें नव्हतें; मर्दखयानें तिला
तशीच आज्ञा केली होती. एस्तेरेचें मर्दखयाच्या येथें
संगोपन होत असतां जशी ती त्याची आज्ञा मानी
त्याचप्रमाणें तिनें या समयींहि त्याची आज्ञा मानिली.
२१ त्या दिवसांत मर्दखय राजद्वारीं बसत असे; तेव्हां
राजाच्या द्वारपाळांपैकीं त्याचे दोन खोजे बिग्थान व तेरेश
हे कोपायमान होऊन अहश्वेरोश राजावर हात टाकण्याची
संधि पाहत होते. २२ मर्दखयास ही गोष्ट कळली तेव्हां
त्यानें एस्तेर राणीस ती सांगितली, आणि एस्तेरेनें
मर्दखयाच्या नांवानें राजास ती सांगितली. २३ चौकशी
झाल्यावर ती बातमी खरी ठरली; तेव्हां त्या दोघांस
झाडावर फांशी दिलें. हें वृत्त राजासमोर इतिहासाच्या
ग्रंथांत लिहून ठेविलें.

३ १ या गोष्टी घडल्यावर अहश्वेरोश राजानें
अगागी हामान बिन हम्मदाथा यास बढती देऊन
उच्च पदास चढविलें व त्याच्याबरोबरच्या सरदारां-
पेक्षां त्याचें आसन उंच केलें. २ राजद्वारीं असलेले
राजाचे सर्व सेवक हामानासमोर वाकून त्यास मुजरा
करीत असत, कारण त्याच्या बाबतींत राजानें अशीच
आज्ञा केली होती; पण मर्दखय कांहीं त्यास नमन
अथवा मुजरा करीत नसे. ३ तेव्हां राजद्वारांतील
राजसेवकांनीं मर्दखयास विचारिलें कीं तूं राजाज्ञेचें
कां उल्लंघन करितोस? ४ ते रोज त्यास असें बोलत
तरी त्यानें त्यांस जुमानिलें नाहीं, तेव्हां मर्दखयाचें
हें करणें चालेल किंवा नाहीं हें पाहण्याकरितां त्यांनीं
हामानाच्या कानीं ही गोष्ट घातली; आपण यहूदी
आहों असें त्यानें त्यांस सांगितलें होतें. ५ मर्दखय
आपणासमोर नमून मुजरा करीत नाहीं हें हामानानें
पाहिलें तेव्हां त्यास फार क्रोध आला. ६ एकट्या
मर्दखयावर हात टाकणें हें त्याला हलकें वाटलें,
कारण मर्दखय कोणत्या जातीचा आहे हें त्यांनीं
हामानास सांगितलें होतें; त्यामुळें अहश्वेरोशाच्या
अवघ्या साम्राज्यांतील मर्दखयाचे लोक म्हणजे
सर्व यहूदी लोक यांचा नायनाट करण्याचा बेत
हामानानें केला. ७ अहश्वेरोश राजाच्या कारकीर्दीच्या
बाराव्या वर्षी त्यांनीं पहिल्या म्हणजे निसान महिन्या-
पासून हामानासमक्ष पूर (चिठ्ठ्या) टाकावयास
लाविल्या. हा क्रम दररोज, दरमहा, बारावा महिना

अदार सैवपर्यंत चालू राहिला. ८ हामान अहश्वेरोश
राजास म्हणाला, आपल्या साम्राज्यांतील सर्व प्रांतांतून
राहणाऱ्या देशोदेशींच्या लोकांमध्यें पांगलेलें व विख-
रलेलें एक राष्ट्र आहे; त्या लोकांचे कायदे इतर
सर्व लोकांच्या कायद्यांहून भिन्न आहेत. तें राजाच्या
कायद्यांप्रमाणें चालत नाहींत म्हणून त्यांस राहूं देणें
राजाच्या हिताचें नाहीं. ९ राजाची मर्जी असल्यास
त्यांचा नाश करावा अशी आज्ञा लिहावी; राजभांडारांत
जमा करण्यासाठीं मी दहा हजार किक्कार[1] चांदी
राजाच्या कारभाऱ्यांच्या हातीं देतों. १० तेव्हां राजानें
आपली मुद्रा आपल्या बोटांतून काढून यहूद्यांचा शत्रु
जो अगागी हामान बिन हम्मदाथा यास दिली.
११ राजानें हामानास म्हटलें, तुला चांदी दिली आहे
व लोकहि दिले आहेत; तुला ठीक वाटेल त्याप्रमाणें
त्यांचें कर. १२ तेव्हां पहिल्या महिन्याच्या त्रयोदशीस
राजाचे लेखक बोलविण्यांत आले, आणि राजाचे प्रति-
निधि, प्रत्येक प्रांताचे सुभे व सगळ्या लोकांचे सरदार
यांस हामानाच्या सांगण्याप्रमाणें प्रत्येक प्रांताच्या लिपींत
व प्रत्येक जातीच्या लोकांच्या भाषेंत (खलितें) लिहून पाठ-
विण्यांत आले. अहश्वेरोश राजाच्या नांवानें ते लिहून त्यांवर
राजाची मोहर केली. १३ राज्याच्या सर्व प्रांतप्रांतांतून
जासुदांच्या हस्तें अशा आशयाचीं पत्रें पाठविण्यांत आलीं कीं
एकाच दिवशीं म्हणजे बाराव्या अदार महिन्याच्या
त्रयोदशीस वृद्ध, तरुण, स्त्रिया, मुलें अशा सर्व यहूदी
लोकांचा विध्वंस, संहार व नायनाट करावा व त्यांची धन-
संपत्ति लुटून घ्यावी. १४ या आज्ञापत्राच्या नकला
साऱ्या प्रांतांतून खुल्या पाठविल्या. त्या अशा
हेतूनें कीं सर्व लोकांनीं त्या दिवशीं तयार असावें.
१५ हा हुकूम शूशन राजवाड्यांत देण्यांत आला,
आणि राजाज्ञेनें जासूद त्वरित निघून गेले; त्या
प्रसंगीं राजा व हामान हे मद्यपान करीत बसले; पण
शूशन नगर चिंताकांत झालें.

१ निर्गम २६:३९ वरील टीप पाहा.

४ १ हें वर्तमान मर्दखयाच्या कानीं पडलें तेव्हां
त्यानें आपलीं वस्त्रें फाडिलीं, गोणताट नेसून राख
फांसिली आणि नगराच्या मध्यभागीं जाऊन
मोठ्यानें आकंदन केलें; २ तो राजमंदिराच्या दरवाजा-
समोरहि गेला; गोणताट नेसून राजमंदिराच्या दर-
वाजाच्या आंत येण्याची कोणास परवानगी नसे.
३ राजाचा हुकूम व फर्मान ज्या ज्या प्रांतांत जाऊन
पोहंचलें तेथें तेथें यहूदी लोकांत मोठा विलाप, उपोषण
व रडारड चालू झाली; बहुतेक लोक गोणताट नेसून
राखेंत पडून राहिले. ४ एस्तेरेच्या दासी व खोजे
यांनीं हें वर्तमान तिला जाऊन सांगितलें; तेव्हां
राणीस फार खेद झाला; मर्दखयानें गोणताट काढून
वस्त्र ल्यावें म्हणून तिनें तें त्याजकडे पाठविलें, पण
तो तें घेईना. ५ राजानें एस्तेरेच्या तैनातीस ठेविलेल्या
खोजांपैकीं हथाक यास तिनें बोलावून आणून सांगितलें
कीं मर्दखयाकडे जाऊन हें काय व असें कां
याची चौकशी कर. ६ हथाक निघून राजमंदिराच्या
दरवाजासमोरील नगराच्या चौकांत मर्दखयाकडे गेला.
७ आपल्यावर काय प्रसंग गुदरला आहे आणि यहूदी
लोकांचा वध व्हावा म्हणून हामानानें राजभांडारांत किती
पैसे भरले आहेत ही सर्व हकीकत मर्दखयानें त्यास
सांगितली; ८ यहूदी लोकांचा विध्वंस करण्याविषयींची
जी आज्ञा शूशन येथें दिली होती त्या लेखाची नकलहि
एस्तेरेस दाखविण्यासाठीं त्याच्या हातीं त्यानें दिली; आणि
हें सर्व कळवून त्यानें तिला असें बजावण्यास सांगितलें कीं
तूं राजाकडे जाऊन आपल्या लोकांसाठीं विनंति व काकळूत
करावी. ९ हथाकानें येऊन मर्दखयाचें म्हणणें एस्तेरेस
सांगितलें. १० तेव्हां एस्तेरेनें हथाकाबरोबर
मर्दखयाला सांगून पाठविलें कीं ११ राजाचे सर्व सेवक
व राजाच्या सर्व परगण्यांतील लोक जाणून आहेत कीं
कोणी पुरुष अथवा स्त्री बोलाविल्यावांचून आंतल्या
चौकांत राजाकडे गेली तर त्याला अथवा तिला प्राणदंड
करावा असा सक्त हुकूम आहे; मात्र राजा आपला
सोन्याचा राजदंड ज्याच्यापुढें करील त्याचाच बचाव

होणार; मला तर आज तीस दिवस राजाकडून
बोलावणें आलें नाहीं. १२ एस्तेरेचें हें म्हणणें मर्द-
खयास कळविण्यांत आलें. १३ तेव्हां त्यानें त्याच्या हस्तें
एस्तेरेस सांगून पाठविलें कीं तूं राजमंदिरांत आहेस
म्हणून तूं यहूदी लोकांतून बचून राहशील असें
तुझ्या मनास वाटूं देऊं नको. १४ तूं या प्रसंगीं गप्प
राहिलीस तरी दुसऱ्या कोठूनहि यहूद्यांची सुटका व
उद्धार होईलच, पण मग तुझा व तुझ्या बापाच्या
घराण्याचा नाश होईल; तुला या असल्याच प्रसंगा-
साठीं राजपद प्राप्त झालें नसेल कशावरून ? १५ मग
एस्तेरेनें मर्दखयास उलट निरोप पाठविला कीं
१६ जा, शूशन येथले सर्व यहूदी जमवा; माझ्या-
करितां उपास करा; तीन दिवस व तीन रात्री अन्नोदक
सेवूं नका; मीहि आपल्या दासींसह तसाच उपास
करीन; असल्या स्थितींत नियमाविरुद्ध मी आंत
राजाकडे जाईन; मग मी मेल्यें तर मेल्यें. १७ मर्द-
खयानें जाऊन एस्तेरेच्या आज्ञेप्रमाणें सर्व कांहीं केलें.

१ तिसऱ्या दिवशीं एस्तेर राणी आपली
५ राजकीय वस्त्रें धारण करून राजमंदिराच्या आंतल्या
चौकांत जाऊन राजमंदिरासमोर उभी राहिली;
राजा राजमंदिरांत सिंहासनावर राजद्वारासमोर बसला
होता. २ राजानें एस्तेर राणी अंगणांत उभी आहे
असें पाहिलें तेव्हां त्याची तिजवर कृपादृष्टि झाली;
आणि राजानें आपल्या हातीं असलेला सुवर्णदंड पुढें
केला. तेव्हां एस्तेरेनें जवळ जाऊन राजदंडाच्या टोकास
स्पर्श केला. ३ राजानें तिला विचारिलें, एस्तेर राणी,
तुला काय पाहिजे ? तुझी काय मागणी आहे ? अर्ध्या
राज्याएवढी तुझी मागणी असली तरी ती मिळेल.
४ एस्तेर म्हणाली, महाराजांच्या मर्जीस आलें तर मीं
आज आपणांसाठीं जें भोजन तयार केलें आहे त्यास
आपण हामानाला घेऊन यावें. ५ राजा म्हणाला,
जा, हामानास लौकर घेऊन या, म्हणजे एस्तेरेच्या
म्हणण्याप्रमाणें करूं. मग एस्तेरेनें तयार केलेल्या
भोजनास राजा व हामान हे गेले. ६ जेवितांना
द्राक्षारस पिण्याच्या वेळीं राजानें एस्तेरेस विचारिलें,
तुझा काय अर्ज आहे ? तो मान्य केला जाईल; तुझी
मागणी काय आहे ? ती अर्ध्या राज्याएवढी असली
तरी तीप्रमाणें करण्यांत येईल. ७ एस्तेर म्हणाली,
माझा अर्ज व मागणी हीच: ८ महाराजांची मजवर
कृपादृष्टि झाली असून माझा अर्ज मंजूर करावा व
माझी मागणी मान्य करावी असें महाराजांच्या मर्जीस
आलें असेल तर मी मेजवानी करणार तिला महाराजांनीं
व हामानानें यावें, मग महाराजांनीं म्हटल्याप्रमाणें
मी उद्यां काय मागावयाचें तें मागेन. ९ त्या
दिवशीं हामान आनंदित व प्रसन्नचित्त होऊन बाहेर
निघाला; पण राजवाड्याच्या दरवाजाजवळ आपणास
पाहून मर्दखय उठला नाहीं कीं थरथर कांपला नाही
हें हामानानें पाहिलें तेव्हां त्याचा त्याला फार क्रोध
आला; १० तरी आपला क्रोध आवरून हामान घरीं
गेला; आणि त्यानें आपले इष्टमित्र व आपली स्त्री जेरेश
यांस बोलावणें पाठवून आणिलें; ११ आपल्या धन-
संपत्तीची थोरवी, आपल्या संततीचा विस्तार, राजानें
आपणांस कशी बढती देऊन राजाचे सरदार व सेवक
यांच्यावर दर्जा दिला हें सर्व त्यानें त्यांस निवेदन
केलें. १२ हामानानें त्यांस आणखी सांगितलें कीं एस्तेर
राणीनें मेजवानी दिली, त्या मेजवानीस तिनें राजा-
बरोबर माझ्याखेरीज दुसऱ्या कोणासहि बोलाविलें नाहीं;
उद्यांहि तिनें मला राजाबरोबर आमंत्रण दिलें आहे.
१३ एवढें असूनहि तो मर्दखय यहूदी राजद्वारीं बसलेला
माझ्या दृष्टीला पडत आहे तोंवर हें सर्व व्यर्थ आहे.
१४ तेव्हां त्याची स्त्री जेरेश व त्याचे सर्व मित्र त्यांस
म्हणाले; पन्नास हात उंचीचा फाशीं देण्याचा एक खांब
उभा करावा आणि उद्यां सकाळीं राजास विनंति करा कीं
मर्दखयास त्यावर फाशीं द्यावें; मग तुम्ही आनंदानें
राजाबरोबर मेजवानीस जा. ही गोष्ट हामानास पसंत
पडून त्यानें फाशीचा खांब तयार करविला.

१ त्या रात्रीं राजाची झोप उडाली; तेव्हां त्याच्या
६ आज्ञेनें इतिहासाचा ग्रंथ आणून लोकांनीं त्याजपुढें
वाचिला. २ त्यांत हा मजकूर होता: अहश्वेरोश
राजाचे खोजे द्वारपाळ असत, त्यांपैकीं दोघे बिग्थान

व तेरेश यांनीं राजावर हात टाकण्याचा बेत केल्याची
मर्दखयानें खबर दिली. ३ तेव्हां राजानें विचारिलें कीं
या कामगिरीबद्दल मर्दखयाचें कांहीं गौरव अथवा
मानसन्मान करण्यांत आला काय? त्याच्या खिदमतींत
असलेल्या सेवकांनीं त्यास सांगितलें, त्याच्या बाबतींत
कांहींएक करण्यांत आलें नाहीं. ४ राजानें विचारिलें,
चौकांत कोण आहे? त्या वेळीं, तयार केलेल्या फाशीं
देण्याच्या खांबावर मर्दखयास फाशीं द्यावें अशी राजा-
पाशीं विनंति करावयास हामान राजमंदिराच्या बाहेरल्या
चौकांत आला होता. ५ राजसेवकांनीं राजास सांगितलें,
हामान चौकांत उभे आहेत. राजा म्हणाला, त्याला आंत
बोलवा. ६ हामान आंत आल्यावर राजानें त्यास
विचारिलें, एकाद्या मनुष्याचा मानसन्मान करण्याचें
राजाच्या मर्जीस आल्यास त्या माणसाची कशी काय संभा-
वना करावी? हामान आपल्या मनांत म्हणाला, मजहून
दुसऱ्या कोणाची अधिक संभावना करण्याचें राजाच्या
मर्जीस येणार? ७ हामान राजास म्हणाला, एकाद्याचें
गौरव करण्याचें महाराजांच्या मर्जीस आल्यास ८ महाराज
धारण करितात तो पोषाख आणवावा, त्याप्रमाणेंच ज्या
घोड्यावर महाराज स्वारी करितात तो व महाराजांच्या
मस्तकीं जो राजमुकुट ठेवितात तो आणवावा; ९ मग तो
पोषाख व घोडा महाराजांच्या कोणाएका मोठ्या सरदा-
राच्या हातीं देऊन महाराज ज्याचें गौरव करूं इच्छितात
त्यास त्यानें तो पोषाख लेववावा, त्या घोड्यावर बसवून
नगराच्या रस्त्यांतून त्याची मिरवणूक काढावी आणि त्याच्या
पुढें ललकारावें कीं राजेसाहेब ज्याचें गौरव करूं इच्छितात
त्याची संभावना या प्रकारें होते. १० राजा हामानास
म्हणाला, त्वरा करून हा पोशाख व हा घोडा घे आणि राज-
द्वारीं मर्दखय बसला आहे त्याची संभावना तुझ्या म्हणण्या-
प्रमाणें कर; तूं बोललास तसें करण्यांत कांहींएक अंतर
होऊं नये. ११ हामानानें तो पोषाख व तो घोडा घेऊन
मर्दखयास सजविलें आणि शहरच्या रस्त्यांतून त्यास
मिरवून त्याच्यापुढें ललकारलें कीं राजेसाहेब ज्याचें
गौरव करूं इच्छितात त्याची या प्रकारें संभावना
होईल. १२ मर्दखय परत राजद्वारीं आला; आणि
हामान विलाप करीत व आपलें मस्तक झांकून घेऊन
लगबगीनें आपल्या घरीं गेला. १३ मग हामानानें
आपली स्त्री जेरेश व आपले सर्व मित्र यांस आपल्या-
वर आलेला प्रसंग विदित केला. तेव्हां त्याचे बुद्धिमान्
मित्र व त्याची बायको हीं त्यास म्हणालीं, या मर्दखया-
पुढें तुमचा अधःपात होऊं लागला आहे; तो जर यहूदी
वंशांतला असला तर तुमचें वर्चस्व व्हावयाचें नाहीं,
त्याच्यापुढें तुमचा अधःपात होणार. १४ तीं त्याच्याशीं
बोलत आहेत तोंच राजाचे खोजे आले आणि एस्तेर
राणीनें तयार केलेल्या मेजवानीस ते हामानास लग-
बगीनें घेऊन गेले.

७ १ ठरल्याप्रमाणें राजा व हामान एस्तेर राणीच्या
मेजवानीस गेले. २ दुसऱ्या दिवशीं भोजनसमयीं
द्राक्षारस पिण्याचे वेळीं राजानें एस्तेरेस पुनः विचारलें,
एस्तेर राणी, तुझा काय अर्ज आहे? तो मान्य करण्यांत
येईल; तुझी मागणी काय आहे? ती अर्ध्या राज्याएवढी
असली तरी तीप्रमाणें करण्यांत येईल. ३ मग एस्तेर
राणी म्हणाली, महाराज, मजवर आपली कृपादृष्टि झाली
असून आपल्या मर्जीस आल्यास मला व माझ्या लोकांस
प्राणदान द्यावें हाच माझा अर्ज व विनंति आहे.
४ माझा व माझ्या लोकांचा विध्वंस, संहार व नाय-
नाट व्हावा या हेतूनें आमची विक्री होऊन चुकली
आहे; आम्हीं केवळ दासदासी व्हावें या हेतूनें आमची
विक्री झाली असती तर मी गप्प राहिलें असतें;
तरी त्या स्थितींतहि त्या वैऱ्याला राजाच्या नुकसानीची
भरपाई करितां आली नसती. ५ अहश्वेरोश राजानें
एस्तेर राणीस विचारिलें, असें करण्याचा हिय्या
करणारा कोण व तो कोठें आहे? ६ एस्तेर म्हणाली, हा
विरोधी व हा शत्रु कोण म्हणून पुसाल तर हा दुष्ट
हामानच. हें ऐकून राजा व राणी यांच्यापुढें हामान
घाबरला. ७ तेव्हां राजा क्रोधाविष्ट होऊन भोजनावरून
उठला व राजमंदिराच्या बागेंत गेला; तेव्हां
मला प्राणदान द्या अशी विनवणी करीत हामान
एस्तेर राणीपुढें उभा राहिला; कारण राजानें आपलें
वाईट करण्याचें ठरविलें आहे हें तो समजून चुकला.

८ मग राजा मंदिराच्या बागेंतून त्या भोजनाच्या
जागीं परत आला असतां एस्तेरेच्या मंचकावर हामानास
ओठंगलेलें त्यानें पाहिलें. तेव्हां राजा म्हणाला, या
घरांत आणि माझ्यासमोर हा राणीवर जबरीहि करूं
पाहतो काय? राजाच्या तोंडून हे शब्द निघतांच
सेवकांनीं जाऊन हामानाचें तोंड झाकिलें. ९ राजाच्या
तैनातीस असलेल्या खोजांपैकीं हर्बोना नांवाचा एक
खोजा म्हणाला, पाहा, हामानाच्या येथें पन्नास हात
उंचीचा एक फाशीं देण्याचा खांब उभा केलेला आहे;
ज्या मर्दखयानें राजाच्या हिताची खबर दिली त्याला
टांगण्यासाठीं हामानानें तो उभा केला आहे. राजानें
म्हटलें, त्याच खांबावर यास फाशीं द्या. १० तेव्हां
जो खांब मर्दखयासाठीं हामानानें तयार केला होता
त्यावर त्यालाच फाशीं दिलें. तेव्हां राजाच्या
क्रोधाचें शमन झालें.

८ १ त्याच दिवशीं अहश्वेरोश राजानें यहूद्यांचा
वैरी हामान याचें घरदार एस्तेर राणीस दिलें.
मर्दखयहि राजाकडे आला; कारण त्याचें एस्तेरेशीं
काय नातें होतें तें तिनें राजाला सांगितलें होतें.
२ हामानाकडून घेतलेली मुद्रा राजानें काढून मर्दखयास
दिली. एस्तेरेनें मर्दखयास हामानाच्या घराचा
कारभारी नेमिलें. ३ मग एस्तेरेनें पुनः राजाचें आर्जव
केलें; ती त्याच्या पायां पडली, आणि रडून त्याची मोठी
काकळूत करून तिनें म्हटलें, यहूद्यांचा नायनाट करण्या-
विषयीं हामान अगागी यानें केलेली अनर्थावह योजना
रद्द करण्यांत यावी. ४ तेव्हां राजानें एस्तेरेपुढें
आपला सोनेरी राजदंड केला, आणि एस्तेर उठून
राजापुढें उभी राहिली. ५ ती म्हणाली, महाराजांच्या
मर्जीस आल्यास, मजवर त्यांची कृपादृष्टि झाली
असल्यास, त्यांस योग्य दिसल्यास व मी त्यांच्या
आवडीची असल्यास महाराजांच्या सर्व प्रांतांत जे यहूदी
आहेत त्यांचा नायनाट करण्याविषयीं अगागी हामान
बिन हम्मदाथा यानें जीं पत्रें लिहून पाठविलीं आहेत
तीं रद्द व्हावीं असें फर्मान पाठविण्यांत यावें; ६ माझ्या
लोकांवर जो अनर्थ ओढवेल तो मी कसा पाहूं?
माझ्या गोत्राचा नाश होईल तो मी डोळ्यांनीं कसा
पाहूं? ७ मग अहश्वेरोश राजा एस्तेर राणीस व
मर्दखय यहूद्यास म्हणाला, हामानानें यहूद्यांवर हात
टाकिला म्हणून त्याचें घरदार मीं एस्तेरेस दिलें व
त्याला फाशीं दिलें. ८ तुम्हांस वाटेल त्याप्रमाणें
राजाच्या नांवानें यहूद्यांविषयीं लिहा, आणि पत्रांवर
राजाची मोहर करा; राजाच्या नांवानें लिहिलेले लेख
व त्यांवर झालेली राजाची मोहर कोणालाहि रद्द करतां
यावयाची नाहीं. ९ त्या समयीं शिवान महिन्याच्या
म्हणजे तिसऱ्या महिन्याच्या तेविसाव्या दिवशीं
राजाच्या लेखकांस बोलावून आणिलें, आणि मर्दखयाच्या
सांगण्याप्रमाणें इस्राएलाच्या अधिपतींस आणि
हिंदिस्तानापासून कूश देशापर्यंतच्या एकशें सत्ताव्वीस
परगण्यांचे अधिपति व सरदार यांस प्रत्येक प्रांताच्या
लिपींत व निरनिराळ्या लोकांच्या भाषांत आणि
यहूद्यांस त्यांच्या लिपींत व भाषेंत खलिते पाठविण्यांत
आले. १० मर्दखयानें अहश्वेरोश राजाच्या नांवानें
पत्रें लिहून त्यांवर राजाची मोहर करून तीं वेगवान
सरकारी घोडे, खेंचरें व सांडणी यांच्या स्वारांबरोबर
डाकेनें रवाना केलीं. ११ त्या पत्रांत सर्व नगरांच्या
यहूद्यांस परवानगी दिली होती कीं तुम्हीं एकवट
होऊन आपल्या प्राणांचें संरक्षण करण्यास उभें
राहावें आणि ज्या ज्या प्रांतांतील लोक जबरदस्त
होऊन तुम्हांस, तुमच्या स्त्रियांस व तुमच्या मुलां-
बाळांस उपद्रव देऊं पाहतील त्यांचा विध्वंस, संहार
व नायनाट करावा व त्यांची धनसंपत्ति लुटावी.
१२ हें सर्व एकाच दिवशीं बाराव्या म्हणजे अदार
महिन्याच्या त्रयोदशीस अहश्वेरोश राजाच्या सर्व
प्रांतांत करण्यांत यावें. १३ फर्मानाची नक्कल प्रत्येक
प्रांतांत प्रसिद्ध व्हावी; आणि त्या दिवशीं आपल्या
शत्रूंचें उसनें फेडण्यास सर्व यहूद्यांनीं तयार व्हावें
असें सर्व लोकांस जाहीर करण्यांत आलें. १४ डाकेच्या
स्वारांनीं सरकारी वेगवान् घोड्यांवर स्वार होऊन
राजाज्ञेप्रमाणें त्वरेनें दौड केली; हा हुकूम शूशन
राजवाड्यांतून सोडण्यांत आला. १५ मग मर्दखय

निळ्या, पांढऱ्या रंगांचीं राजकीय वस्त्रें लेऊन, डोक्यावर
सोन्याचा मोठा मुकुट ठेवून, व तलम सणाचा व जांभळ्या
रंगाचा झगा घालून राजासमोरून निघाला; तेव्हां
शूशन नगरचे लोक आनंदानें जयघोष करूं लागले;
१६ आणि यहूदी लोकांस उल्लास, आनंद व मान हीं
प्राप्त झालीं. १७ ज्या प्रांतांत व ज्या नगरांत राजाची
आज्ञा व फर्मान जाऊन पोहंचलें तेथल्या यहूद्यांस मोठा
हर्ष झाला आणि त्यांनीं भोजनसमारंभ करून तो
मंगलदिन म्हणून पाळिला; आणि त्या देशचे पुष्कळ
लोक यहूदी झाले, कारण त्यांस यहूद्यांचा मोठा
धाक बसला.

९ १ अदार जो बारावा महिना त्याच्या त्रयो-
दशीस राजाची आज्ञा व फर्मान अमलांत येऊन
यहूदी लोकांवर वरचढ होण्याचा आशेचा दिवस
समीप आला तों सर्व उलट होऊन यहूदी लोक
आपल्या वैऱ्यांवर वरचढ झाले; २ आपणांस उपद्रव
करूं पाहणाऱ्या वैऱ्यांस हात दाखवावा म्हणून अह-
श्वेरोश राजाच्या सर्व प्रांतांतील यहूदी लोक आप-
आपल्या गांवीं एकवट झाले; त्यांच्याशीं कोणासहि
सामना करवेना; त्यांचा सर्व लोकांस धाक बसला.
३ प्रांतांचे सरदार, इलाख्यांचे अधिपति, प्रांतांचे
अधिपति व राज्यकारभार चालविणारे सर्व जन
यांनीं यहूद्यांस कुमक केली; त्या सर्वांस मर्दखयाचा
धाक बसला होता. ४ मर्दखयाचा राजदरबारीं मोठा
मान असून त्याची कीर्ति सर्व प्रांतांतून पसरली होती;
मर्दखयाचा महिमा उत्तरोत्तर वाढत गेला.
५ इकडे यहूदी लोकांनीं आपल्या सर्व शत्रूंवर तरवार
चालवून त्यांचा वध व विध्वंस केला; मनास येईल
तसा त्यांनीं आपल्या विरोध्यांचा समाचार घेतला.
६ शूशन राजवाड्यांत यहूदी लोकांनीं पांचशें लोकांचा
वध करून त्यांचा धुव्वा उडविला. ७ पर्शन्दाथा,
दलफोन, अस्पाथा, ८ पोराथा, अदल्या, अरीदाथा,
९ पर्मश्ता, अरीसई, अरीदय व वैजाथा, १० हे
यहूद्यांचा वैरी हामान बिन हम्मदाथा याचे दहा
पुत्र त्यांनीं ठार केले, पण लुटीस त्यांनीं हात लाविला
नाहीं. ११ त्या दिवशीं शूशन राजवाड्यांत ज्यांचा
वध झाला त्यांची यादी राजाकडे आणिली. १२ तेव्हां
राजा एस्तेर राणीस म्हणाला, यहूद्यांनीं शूशन राज-
वाड्यांतले पांचशें पुरुष व हामानाचे दहा पुत्र मारून
त्यांचा फडशा उडविला आहे; मग राज्याच्या इतर
प्रांतांत त्यांनीं काय केलें असेल तें कोणास ठाऊक!
आतां आणखी तुझा कांहीं अर्ज आहे काय? तो
मंजूर होईल; आणखी कांहीं मागणें आहे काय?
त्याप्रमाणें करण्यांत येईल. १३ एस्तेर म्हणाली,
राजाची मर्जी असल्यास आजच्या हुकमाप्रमाणें
उद्यांहि करण्यास शूशन येथील यहूद्यांस मुभा असावी
आणि हामानाच्या दहा पुत्रांस फाशीं देण्याच्या खांबावर
लटकावावें. १४ त्याप्रमाणें करण्याची राजाज्ञा झाली;
शूशन येथून फर्मान निघालें व लोकांनीं हामानाच्या
दहा पुत्रांस फासावर लटकाविलें. १५ शूशन येथील
यहूद्यांनीं अदार महिन्याच्या चतुर्दशीसहि एकवट
होऊन शूशन येथील तीनशें पुरुष मारिले; पण त्यांनीं
लुटीस हात लाविला नाहीं. १६ राज्यांतील निरनिराळे
यहूदी एकवट होऊन आपला प्राण बचावण्यास उभे
राहिले; त्यांनीं आपल्या वैऱ्यांपैकीं पंचाहत्तर हजार
लोकांचा संहार केला व ते वैऱ्यांपासून विसावा पावले;
पण त्यांनीं लुटीस हात लाविला नाहीं. १७ अदार
महिन्याच्या त्रयोदशीस हें घडलें; त्यांनीं चतुर्दशीस
विश्रांति घेऊन तो दिवस मेजवानीचा व आनंदोत्सवाचा
ठरविला; १८ पण शूशन येथले यहूदी तेरावा
व चौदावा अशा दोन दिवशीं एकवट झाले
आणि पंधराव्या दिवशीं त्यांनीं विश्रांति घेऊन तो
दिवस मेजवानीचा व आनंदोत्सवाचा ठरविला.
१९ यास्तव गांवकूस नसलेल्या गांवांत राहणारे
गांवढेकरी यहूदी अदार महिन्याची चतुर्दशी
आनंदोत्सवाचा मंगलदिन व एकमेकांस भेटीचीं ताटें
पाठविण्याचा दिवस ठरवून पाळितात.

२० मग मर्दखयानें हें सर्व वृत्त लिहून काढिलें आणि
अहश्वेरोश राजाच्या दूरच्या व जवळच्या सर्व प्रांतां-
तील यहूदी लोकांस पत्रें पाठवून येणेंप्रमाणें फर्माविलें:

२१ अदार महिन्याचा चौदावा व पंधरावा हे दिवस
वर्षोवर्षी पाळीत जावे; २२ या दिवशीं यहूद्यांस आपल्या
शत्रूंपासून विसावा प्राप्त झाला, या महिन्यांत दुःख जाऊन
आनंद झाला, आणि शोक जाऊन शुभदिन प्राप्त झाला,
म्हणून तो पाळावा; हे दिवस आनंदोत्सव करण्यांत,
एकमेकांस भेटीचीं ताटें पाठविण्यांत व गोरगरिबांस
दानधर्म करण्यांत घालवावे. २३ यहूदी लोकांनीं आरंभ
केला होता त्याप्रमाणें व मर्दखयानें त्यांस लिहून
पाठविलें होतें त्याप्रमाणें यहूद्यांनीं संप्रदाय चालू करण्याचें
कबूल केलें; २४ सर्व यहूद्यांचा विरोधी अगागी
हामान बिन हम्मदाथा यानें यहूद्यांच्या विध्वंस करण्याचा
संकल्प केला असून त्यांचा पूर्णपणें नायनाट करण्या-
साठीं त्यानें पूर म्हणजे चिठ्या टाकिल्या होत्या; २५ पण
राजाच्या लक्षांत हें प्रकरण येऊन त्यानें लेखी हुकूम
केला. यावरून हामानानें जी दुष्ट युक्ति यहूदी
लोकांविरुद्ध योजली होती ती त्याच्याच माथीं उलटली
आणि तो व त्याचे पुत्र फांशीच्या खांबावर टांगण्यांत
आले. २६ यास्तव पूर या शब्दावरून त्या दिवसास
पुरीम हें नांव पडलें. या पत्रांतील मजकुरावरून आणि
त्यांनीं स्वतः या बाबतींत जें पाहिलें होतें आणि त्यांजवर
जें बेतलें होतें त्यावरूनहि, २७ यहूदी लोकांनीं
आपणांसाठीं, आपल्या वंशजांसाठीं व जे त्यांस
सामील झाले होते त्यांच्यासाठीं असा अढळ नियम व
प्रतिज्ञा केली कीं त्या लेखानुसार वर्षोवर्षी नियमित
काळीं हे दोन दिवस पाळावे; २८ आणि पिढ्यान-
पिढ्या प्रत्येक कुटुंबांत, प्रत्येक प्रांतांत व प्रत्येक
गांवांत या दिवसांचें स्मरण करून ते पाळण्यांत यावे.
या पुरीम सणाचे दिवस पाळण्यास यहूदी लोकांनीं
चुकूं नये; त्यांचें स्मरण आमच्या वंशजांतून कधींहि
नाहींसें होऊं नये. २९ या दुसऱ्या पत्रानुसार पुरीम
पाळण्याचें मंजूर व्हावें म्हणून अबीहइलाची कन्या
एस्तेर राणी हिनें आणि मर्दखय यहूदी यानें आपल्या
अधिकारानें फर्मान लिहिलें. ३० त्याच्या नकला मर्द-
खयानें अहश्वेरोश राजाच्या एकशें सत्तावीस प्रांतांतल्या
सर्व यहूद्यांस लिहून पाठविल्या; त्यांत शांतिप्रद सत्य
वचनें होतीं; ३१ त्या पत्राचा आशय असा होता कीं
पुरिमाच्या नेमलेल्या समयीं मर्दखय व एस्तेर राणी यांच्या
आज्ञेप्रमाणें आणि यहूदी लोकांनीं स्वतःसाठीं व आपल्या
वंशजांसाठीं केलेल्या ठरावाप्रमाणें उपवास व विलाप
करण्यांत यावा. ३२ पुरिमाच्या संबंधाचा नियम एस्तेरेच्या
आज्ञेनें मुकर झाला, आणि हें ग्रंथांत लिहून ठेवलें.

१ अहश्वेरोश राजानें देशावर व समुद्रा-
१० लगतच्या बेटांवर खंड बसविला. २ त्याचीं
सामर्थ्याचीं व पराक्रमाचीं जीं कृत्यें त्यांचीं
आणि मर्दखयास राजानें महतीस चढविल्याची साद्यंत
हकीकत मेदी व पारसी यांच्या इतिहासाच्या ग्रंथांत
लिहिली आहे, नाहीं काय? ३ मर्दखय यहूदी
याचा दर्जा अहश्वेरोश राजाच्या खालोखाल होता;
यहूदी लोकांमध्यें तो फार थोर होता; त्याच्या बांधव-
समुदायांत त्याची मोठी मान्यता असे; तो आपल्या
लोकांचें कल्याण करण्यास झटे व आपल्या सर्व
लोकांचें कुशल कसें होईल याकडे त्याचें लक्ष असे.

# ईयोब



१ ऊस देशांत एक पुरुष होता, त्याचें नांव
१ ईयोब असें होतें; तो सात्विक व सरळ होता;
तो देवाला भिऊन वागे व पापापासून दूर राही.
२ त्याला सात पुत्र व तीन कन्या झाल्या. ३ सात
हजार मेंढरें, तीन हजार उंट, बैलांच्या पांचशें जोड्या
व पांचशें गाढवी एवढें त्याचें धन होतें; आणि त्याचा
परिवार फार मोठा होता; असा तो पूर्व देशांतल्या
सर्व लोकांत थोर होता. ४ त्याचे पुत्र पाळीपाळीनें
एकमेकांच्या घरीं भोजनसमारंभ करीत, व त्या वेळीं
आपल्या तिन्ही बहिणींस पंक्तीस बोलावीत. ५ हे भोजन-
समारंभ आटपल्यावर ईयोब त्यांना बोलावून आणून
त्यांची शुद्धि करी; तो प्रातःकाळीं उठून त्या सर्वांच्या
संख्येइतक्या बलींचें हवन करी; कारण तो म्हणे
कीं न जाणों माझ्या पुत्रांनीं पाप केलें असेल आणि
आपल्या मनानें देवाचा अव्हेर केला असेल. असा
ईयोबाचा नित्यक्रम असे.

६ एक दिवस असा आला कीं त्या दिवशीं देवपुत्र
परमेश्वरापुढें येऊन उभे राहिले, व त्यांच्यामध्यें
सैतानहि आला. ७ परमेश्वर सैतानास म्हणाला, तूं
आतां कोठून आलास ? सैतानानें परमेश्वरास उत्तर
केलें, मी पृथ्वीवर इकडेतिकडे हिंडून फिरून आलों
आहें. ८ परमेश्वरानें सैतानास विचारिलें, माझा सेवक
ईयोब याच्याकडे तुझें लक्ष गेलें आहे काय ? भूतलावर
त्याच्या तोडीचा सात्विक, सरळ, देवाला भिऊन
वागणारा व पापापासून दूर राहणारा असा दुसरा
कोणी नाहीं. ९ सैतानानें परमेश्वराला उत्तर दिलें कीं
ईयोब देवाचें भय काय फुकट बाळगितो ? १० तो,
त्याचें घर व त्याचें सर्वस्व यांभोंवतीं तूं कुंपण घातलें
आहे ना ? तूं त्याच्या हातास यश दिलें आहे ना ? व
देशांत त्याचें धन वृद्धि पावत आहे ना ? ११ तूं
आपला हात पुढें करून त्याच्या सर्वस्वास लावून तर
पाहा, म्हणजे तो तुझ्या तोंडावर तुझा अव्हेर करील.
१२ परमेश्वर सैतानास म्हणाला, पाहा, त्याचें सर्वस्व
तुझ्या हातीं देतों; त्याला मात्र हात लावूं नको. मग
सैतान परमेश्वरासमोरून निघून गेला.

१३ एके दिवशीं असें झालें कीं ईयोबाचे पुत्र
व कन्या आपल्या ज्येष्ठ बंधूच्या घरीं भोजन करीत व
द्राक्षारस पीत असतां, १४ एका जासुदानें ईयोबा-
कडे येऊन सांगितलें, बैल नांगरीत होते व त्यांच्या-
जवळ गाढवी चरत होत्या; १५ तेव्हां शबाई लोक
घाला घालून त्यांस घेऊन गेले; त्यांनीं तरवारीच्या
धारेनें गड्यांस वधिलें; हें तुला सांगावयास मीच
एकटा निभावून आलों आहें. १६ तो हें सांगत
आहे इतक्यांत दुसऱ्या एकानें येऊन सांगितलें, दैवी
अग्नीचा आकाशांतून वर्षाव झाला; त्यानें मेंढरें व
गडी जाळून भस्म केले; हें तुला सांगावयास मीच
एकटा निभावून आलों आहें. १७ तो हें सांगत आहे
इतक्यांत आणखी एकानें येऊन सांगितलें, खास्द्यांनीं
तीन टोळ्या करून उंटांवर घाला घातला व ते ते
घेऊन गेले; त्यांनीं तरवारीच्या धारेनें गड्यांस
वधिलें; हें तुला सांगावयास मीच एकटा निभावून
आलों आहें. १८ तो हें सांगत आहे इतक्यांत
आणखी एकानें येऊन सांगितलें, तुझे पुत्र व कन्या हीं
आपल्या ज्येष्ठ बंधूच्या घरीं भोजन करीत व द्राक्षा-
रस पीत होतीं, १९ तों रानाकडून आलेल्या प्रचंड
वाऱ्याच्या सोसाट्यानें त्या घराचे चारी कोपरे हादरले;
त्यामुळें तें घर त्या तरुण मंडळीवर कोसळलें; आणि
तीं सगळीं मरून गेलीं; हें तुला सांगावयास मीच
एकटा निभावून आलों आहें. २० तेव्हां ईयोबानें
उठून आपला झगा फाडिला, आपलें डोकें मुंडिलें, व
भुईवर पालथें पडून देवाला दंडवत घातलें.
२१ तो म्हणाला,

मी मातेच्या उदरांतून नग्न आलों
आणि तसाच जेथून नग्न आलों तेथें परत जाव-
याचा आहें;
परमेश्वरानें दिलें, आणि परमेश्वरानें नेलें;
धन्य परमेश्वराचें नाम !
२२ या सर्व प्रसंगांत ईयोबाच्या हातून पाप झालें
नाहीं; व अनुचित कृत्य केल्याचा आरोप त्यानें देवावर
केला नाहीं.

२ १ पुन: एक दिवस असा आला की त्या दिवशी
देवपुत्र परमेश्वरासमोर येऊन उभे राहिले; त्यांच्या-
मध्यें सैतानहि परमेश्वरासमोर येऊन उभा राहिला.
२ परमेश्वर सैतानास म्हणाला, तूं आतां कोठून आलास ?
सैतानानें परमेश्वरास उत्तर केलें, मी पृथ्वीवर इकडे-
तिकडे हिंडून फिरून आलों आहें. ३ परमेश्वरानें सैतानास
विचारिलें, माझा सेवक ईयोब याजकडे तुझें लक्ष गेलें
आहे काय ? भूतलावर त्याच्या तोडीचा सात्विक, सरळ,
देवाला भिऊन चालणारा व पापापासून दूर राहणारा
असा दुसरा कोणी नाहीं; त्याचा निष्कारण नाश कर-
ण्यास तूं मला चिथाविलें, तरी तो आपल्या सत्वाला
धरून राहिला आहे. ४ सैतानानें परमेश्वरास उत्तर
केलें, त्वचेसाठीं त्वचा ! मनुष्य आपल्या प्राणासाठीं
आपलें सर्वस्व देईल. ५ तूं आपला हात पुढें करून
त्याच्या हाडामांसास लावून तर पाहा, म्हणजे तो तुझ्या
तोंडावर तुझा अव्हेर करील. ६ परमेश्वर सैतानाला
म्हणाला, पाहा, तो तुझ्या हातीं आहे, त्याची प्राणहानि
मात्र करूं नको. ७ मग सैतान परमेश्वरासमोरून
गेला; आणि त्यानें ईयोबास मोठमोठ्या गळवांनीं नख-
शिखांत अतिशय पीडिलें. ८ ईयोबानें आपलें अंग
खाजविण्यासाठीं एक खापरी घेतली; आणि तो जाऊन
राखेंत बसला. ९ तेव्हां त्याची स्त्री त्याला म्हणाली,
तुम्ही अजून सत्व धरून राहिलां आहां काय ? देवाचें नांव
सोडून द्या आणि मरून जा. १० तो तिला म्हणाला, तूं
धर्महीन स्त्रियांप्रमाणें बोलतेस; देवापासून सुख घ्यावें,
आणि दुःख घेऊं नये काय ? या सर्व प्रसंगीं ईयोबानें
आपल्या वाचेनें कांहीं पाप केलें नाहीं.

११ ईयोबाचे तिघे मित्र अलीफज तेमानी, बिल्दद
शूही, व सोफर नामाथी हे त्याजवर आलेल्या अरिष्टा-
विषयीं ऐकून आपआपल्या ठिकाणाहून निघाले; ईयोबा-
कडे आपण मिळून जावें व त्याच्या संकटाबद्दल खेद
प्रदर्शित करून त्याचें समाधान करावें असा त्यांनीं संकेत
केला. १२ त्यांनीं ईयोबास दुरून न्याहाळून पाहिलें तों
तो त्यांस ओळखितां येईना, मग ते मोठ्यानें रडले;
प्रत्येकानें आपला झगा फाडिला आणि आकाशाकडे धूळ
उडवून त्यांनीं ती आपल्या डोक्यांत घातली. १३ ते सात
दिवस व सात रात्री त्याजबरोबर जमिनीवर बसले;
त्याचें दुःख फार भारी आहे असें पाहून कोणी
त्याच्याशीं एकहि शब्द बोलला नाहीं.

३ १ नंतर ईयोबानें तोंड उघडून आपल्या
जन्मदिवसाला शाप दिला. २ ईयोब म्हणाला,
३ मी जन्मलों तो दिवस जळो !
पुरुषगर्भ राहिला असें जी रात्र म्हणाली ती जळो.
४ तो दिवस अंधार होवो;
ईश्वर त्या दिवसाची निगा न करो;
त्यावर प्रकाश न पडो.
५ अंधकार व मृत्युच्छाया हीं त्याला आपला आप्त
लेखोत;
तो दिवस अभ्राच्छादित होवो;
दिवसास जें काळोखी आणितें तें सर्व त्याला भय-
भीत करो.
६ काय ती रात्र ! काळोख तिला पछाडो !
वर्षाच्या दिनमालिकेंत ती आनंद न करो;
महिन्याच्या तिथींत तिची गणना न होवो.
७ पाहा ! ती रात्र निष्फळ असो;
तींत आनंदघोषाचा प्रवेश न होवो.
८ दिवसाला शाप देणारे, लिव्याथानाला चेतविण्यांत
निपुण असणारे
तिला शाप देवोत.
९ तिच्या प्रभातसमयींचे तारे अंधकारमय होवोत;

१ समुद्रांतला राक्षस

ती प्रकाशाची अपेक्षा करो, पण तो तिला न मिळो;
तिला उषानेत्रांचें दर्शन न घडो;
१० कारण तिनें माझ्या मातेचें गर्भाशयद्वार बंद
केलें नाहीं,
दुःख माझ्या डोळ्यांआड ठेविलें नाहीं.
११ मी गर्भाशयांतच कां नाहीं मेलों?
गर्भाशयांतून निघतांच माझा प्राण कां नाहीं गेला?
१२ मांड्यांनीं माझा स्वीकार कां केला?
मीं चोखावीं म्हणून स्तनांनीं माझा स्वीकार कां
केला!
१३ केला नसता तर मी आज पडून स्वस्थ राहिलों
असतों,
मी निजलों असतों, मी विसावा पावलों असतों;
१४ आपणांसाठीं शून्य मंदिरें बांधणारे
भूपति व मंत्री यांजबरोबर,
१५ सोन्याचा संचय करणारे,
आपलीं घरें चांदीनें भरून ठेवणारे सरदार
यांजबरोबर मी विसावा पावलों असतों.
१६ अकालीं पतन पावलेल्या गुप्त गर्भासारखा,
प्रकाश कधीं न पाहिलेल्या अर्भकांसारखा मी
असतों.
१७ तेथें दुर्जन त्रास देण्याचें थांबवितात,
श्रांत विश्रांति पावतात.
१८ तेथें बंदिवान एकत्र निश्चिंत राहतात;
वेठीस लावणाऱ्याचा शब्द त्यांच्या कानीं पडत
नाहीं.
१९ तेथें लहानथोर समान असतात;
दास आपल्या धन्यापासून मोकळा असतो.
२० विपन्नाला प्रकाश कां मिळतो?
जे मनाचे दुःखी त्यांस जीवन कां प्राप्त होतें?
२१ ते मृत्यूची उत्कट अपेक्षा करितात,
पण तो येत नाहीं;
गुप्त निधीसाठीं खणणाऱ्यापेक्षां ते मृत्यूच्या
प्राप्तीसाठीं अधिक खटाटोप करितात;
२२ त्यांस शवगर्ता प्राप्त झाली म्हणजे ते हर्ष करितात,
त्यांस अत्यानंद होतो.
२३ ज्या पुरुषाचा मार्ग गुप्त आहे,
ज्याला देवानें कुंपण करून कोंडिलें आहे,
अशाला प्रकाश कां प्राप्त होतो?
२४ मला तर अन्नाऐवजीं उसासे प्राप्त होत आहेत,
माझा आक्रोश जलधारांप्रमाणें वाहत आहे.
२५ मला कशाचीहि भीति वाटली तर तेंच मज-
वर येतें,
कशानेंहि मला थरकांप झाला तर तेंच मजवर येतें.
२६ मी निश्चिंत, स्वस्थ व विश्रांत नाहीं,
तरी देखील मला आणखी क्लेश प्राप्त होत आहे.

४ १ मग अलीफज तेमानी म्हणाला,
२ तुजशीं मी कांहीं बोललों तर तुला वाईट
नाहीं ना वाटणार?
तरी बोलल्यावांचून कोणाच्यानें राहवेल?
३ पाहा, तूं बहुत जनांस शिक्षण दिलें आहे,
आणि दुर्बळ हात सबल केले आहेत.
४ तुझ्या शब्दांनीं ठेंचाळत असलेल्यास धीर दिला आहे,
लटपटणारे गुडघे तूं स्थिर केले आहेत;
५ पण तुजवर प्रसंग आला असतां तूं कष्टी होतोस;
तुला दुःखस्पर्श झाला म्हणजे तूं घाबरतोस.
६ तुझ्या देवभक्तीचा तुला आश्रय आहे ना?
तुझ्या सात्विक आचरणावर तुझी आशा आहे ना?
७ कोणी निरपराध असून कधीं नाश पावला
आहे काय?
धार्मिक कधीं विलयास गेले आहेत काय? याचा
विचार कर.
८ माझ्या पाहण्यांत तर असें आहे कीं जे अधर्माची
नांगरणी करितात
व दुःखाची पेरणी करितात,
ते तशीच कापणी करितात.
९ देवाच्या श्वासानें ते विलय पावतात,
त्याच्या कोधाच्या फुंकरानें ते नाहींतसे होतात.
१० सिंहाची गर्जना खुंटते, विक्राळ सिंहाचा

नाद खुंटतो,
पण सिंहाचे दांत उपटले जातात.
११ वृद्ध सिंह भक्ष्य न मिळाल्यामुळें मरतो,
सिंहिणीचे पेटे चोहोंकडे पांगतात.
१२ एक गुप्त गोष्ट मला कळली,
माझ्या कानीं तिची गुणगुण आली;
१३ रात्रीं मनुष्यें निद्रावश होतात अशा समयीं
मला दृष्टांत होऊन मी विचारलहरींत मग्न झालों असतां,
१४ मला भीति प्राप्त होऊन मी थरथरां कांपूं लागलों,
माझीं हाडें लटलटूं लागलीं;
१५ माझ्या तोंडाजवळून वायुस्वरूपी असा कोणी गेला;
तेव्हां माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले.
१६ तो तेथें उभा राहिला, पण त्याचा आकार मला नीट दिसला नाहीं;
तरी माझ्यासमोर कांहीं आकृति होती;
मीं मंद वाणी ऐकली कीं
१७ मर्त्य मानव ईश्वरापुढें धार्मिक ठरेल काय ?
मनुष्य आपल्या उत्पन्नकर्त्यापुढें शुद्ध ठरेल काय ?
१८ पाहा, तो तर आपल्या सेवकांचाहि भरंवसा धरीत नाहीं;
तो आपल्या दिव्यदूतांस प्रमाद केल्याचा दोष लावितो;
१९ तर मृत्तिकागृहांत जे राहतात,
ज्यांचा पाया मातींत घातला आहे,
त्यांचा त्याच्यापुढें काय पाड !
ते पतंगासारखे चिरडले जातात.
२० सकाळपासून संध्याकाळपर्यंतच्या अवकाशांत ते छिन्नभिन्न होतात;
त्यांचा कायमचा नाश होतो व कोणी त्यांची परवा करीत नाहीं.
२१ त्यांच्या राहुटीचा तणावा कापला जात नाहीं काय ?
ज्ञानप्राप्तीविना ते मरून जातात.

५ १ आतां हाक मारून पाहा;
कोणी तुला उत्तर देईल काय ?
कोणा पवित्र जनाकडे तूं धाव घेशील ?
२ मूर्ख तर चिंता करून करून नाश पावतो;
वेडा मत्सरानें मरतो.
३ मीं मूढास मुळावलेलें पाहिलें;
पण लागलेंच मला त्याच्या वसतिस्थानाचा धिक्कार करावा लागला.
४ त्याचीं मुलेंबाळें उद्धाराला अंतरलीं आहेत;
वेशींत त्यांचा चुराडा होतो;
त्यांचा कोणी बचाव करणारा नाहीं.
५ त्याचें पीक क्षुधित लोक खाऊन टाकितात;
कांट्याकुट्यांतूनहि तें ते काढून नेतात;
सापळा त्यांच्या धनासाठीं आ पसरितो.
६ कारण विपत्ति मातींतून निघत नाहीं,
आणि कष्ट भूमींतून उगवत नाहीं;
७ पण ठिणग्या वर उडतात
तसे मानव कष्ट भोगण्यासाठीं जन्मास येतात.
८ मीं तर ईश्वराचा धावा केला असता;
मीं देवावर हवाला टाकिला असता.
९ तो अतर्क्य महत्कृत्यें करितो;
तो अगणित अद्भुत कृत्यें करितो;
१० तो पृथ्वीतलास उदक देतो,
शेतांस पाणी पाठवितो;
११ तो नीचावस्थ जनांस उच्च करितो;
शोकमग्न उन्नत होऊन समृद्धि पावतात.
१२ तो धूर्तांचे बेत निष्फल करितो,
त्यामुळें त्यांच्या हातून कांहीं कार्यसिद्धि होत नाहीं.
१३ तो शहाण्यांस त्यांच्याच धूर्ततेनें धरितो;
कुटिलांच्या मसलतीचा तो त्वरित शेवट करितो.
१४ काळोख त्यांस भर दिवसा गांठितो,
भर दुपारीं ते जसे काय रात्रीच्या सारखे चाचपडतात.

---
१ अथवा: आत्मा गेला;

१५ तो दीनांस बलवानांच्या मुखरूपी तरवारीपासून,
त्यांच्या हातून वांचवितो.
१६ कंगालांस आशा उत्पन्न होते,
अधर्म आपलें तोंड बंद करितो.
१७ पाहा, ईश्वर ज्याचें शासन करितो तो पुरुष धन्य;
म्हणून सर्वसमर्थाचें शासन तुच्छ मानूं नको;
१८ कारण दुखापत तो करितो आणि पट्टीहि
तोच बांधितो;
धाय तो करितो आणि त्याचाच हात तो
बरा करितो.
१९ तो तुला सहा संकटांतून सोडवील;
सातांनीं तुला कांहीं अपाय होणार नाहीं.
२० दुष्काळांत मृत्यूपासून, युद्धांत तरवारीच्या
धारेपासून
तो तुझा बचाव करील.
२१ जिव्हाप्रहार होऊं लागला म्हणजे तूं लपविला
जाशील; विनाश प्राप्त झाला असतां तूं त्यास
डगमगणार नाहींस.
२२ विनाश व दुष्काळ यांस तूं हसशील;
पशूंचें भय तुला वाटणार नाहीं.
२३ मैदानांतल्या पाषाणांशींहि तुझा स्नेह होईल;
वनपशु तुझ्याशीं सलोखा करितील.
२४ तुझा डेरा शांतिसमाधानाचा आहे अशी तुला
प्रतीति येईल;
तूं आपल्या घरादाराकडे पाहशील तेव्हां तुला
कांहीं उणें नाहीं असें दिसून येईल.
२५ तुझा वंश वृद्धि पावेल,
जमिनीवरच्या हरळीसारखें तुझें संतान वाढेल,
असें तुला दिसून येईल.
२६ हंगामाच्या वेळीं धान्याची सुडी आणून ठेवितात,
तसा तूं पुऱ्या वयाचा होऊन कबरेंत जाशील.
२७ पाहा, आम्हीं शोध करून पाहिलें तें हें आहे;
हें तूं ऐकून ध्यानांत ठेव.

६

१ मग ईयोबानें उत्तर केलें,
२ कोणीं माझा खेद तोलावा,
माझी विपत्ति ताजव्यांत घालावी!
३ ती समुद्राच्या वाळूपेक्षां जड भरेल?
म्हणूनच माझें बोलणें मर्यादेबाहेर गेलें आहे.
४ सर्वसमर्थाचे तीर माझ्या देहांत शिरले आहेत,
त्यांचें विष माझा जीव शोषून घेत आहे;
ईश्वराकडून आलेलीं संकटें मजविरुद्ध सज्ज
झालीं आहेत.
५ रानगाढवाला गवत सांपडतें तेव्हां तो ओरडतो
काय?
बैलापुढें चारा असतां तो हंबरतो काय?
६ बेचव वस्तु मिठाशिवाय खातात काय?
अंड्याच्या पांढऱ्या बलकाला रुचि असते काय?
७ ज्या वस्तूंना मी स्पर्श करीत नसें
त्या माझा किळसवाणा आहार झाल्या आहेत.
८ माझें मागणें मला मिळतें,
माझें अपेक्षित ईश्वर मला देता,
९ ईश्वराची मर्जी लागून त्यानें मला चिरडिलें असतें,
आपला हात लांब करून मला छेदून टाकिलें
असतें,
तर किती बरें होतें!
१० तशानें माझी शांति झाली असती;
बेसुमार पीडेंतहि मला हर्ष वाटला असता;
कारण त्या पवित्र प्रभूच्या वचनांचा मीं कधींहि
धिक्कार केला नाहीं.
११ माझ्यांत अशी काय शक्ति आहे कीं मी
उमेद धरूं?
माझा असा काय परिणाम होणार आहे कीं मी
धीर धरूं?
१२ माझी शक्ति पाषाणाच्या इतकी आहे काय?
माझा देह पितळेचा आहे काय?

१३ मी अगदीं लाचार, निरुपाय बनलों असून
माझ्यांतलें कर्तृत्व अगदीं नष्ट झालें आहे ना ?
१४ गलित झालेल्यावर दया करणें हा मित्रधर्म आहे;
न केल्यास तो सर्वसमर्थाचें भय सोडून द्यावयाचा.
१५ माझे बांधव ओढ्याप्रमाणें दगा देणारे झाले आहेत;
ते आटणाऱ्या ओहळाच्या पात्राप्रमाणें झाले आहेत;
१६ ते ओढे वितळणाऱ्या बर्फानें गढूळ होतात;
हिम त्यांत मिश्रित असतें;
१७ ते तापले म्हणजे आटून जातात;
उष्णता होऊं लागली म्हणजे ते आपल्या जागीं जिरून जातात.
१८ ते भ्रमून भ्रमून सुकून जातात,
वैराण प्रदेशांत वाहून नष्ट होतात.
१९ तेमाच्या प्रवाशांनीं त्यांचा शोध केला;
शबाच्या काफल्यांनीं त्यांची अपेक्षा केली;
२० पण त्यांच्या आशेची निराशा झाली;
तेथें पोंचून ते फजीत झाले.
२१ तसें तुम्हीहि शून्यवत् झालां आहां.
विपत्ति पाहून तुम्ही भ्यालां आहां.
२२ मला कांहीं द्या,
आपल्या संपत्तींतून मला कांहीं धर्म करा;
२३ शत्रूंच्या हातून मला सोडवा;
उपद्रव देणाऱ्यांच्या काबूंतून मला मुक्त करा,
असें कांहीं मीं तुम्हांला म्हटलें होतें काय ?
२४ माझी समजूत करा म्हणजे मी उगा राहीन;
मी कोठें चुकलों हें मला समजावून सांगा.
२५ सत्याची वाणी किती जोरदार असते !
तुमच्या वाक्ताडनाचा काय उपयोग ?
२६ तुम्ही शब्दाशब्दाला धरावयाला पाहतां काय ?
निराश मनुष्याचे उद्गार केवळ वायफळ आहेत.
२७ तुम्ही तर पोरक्यावर चिठ्या टाकण्यास
व आपल्या मित्राचा क्रयविक्रय करण्यास चुकत नाहीं.
२८ आतां मजकडे नीट पाहण्याची मेहरबानी करा;
मी कांहीं तुमच्यासमक्ष सहसा लबाडी करणार नाहीं.
२९ पुनः वाद करा; कांहीं अन्याय होऊं देऊं नका;
पुनरपि बोला; माझी धार्मिकता पूर्ववत् स्थापीत होईल.
३० माझ्या जिव्हेच्या ठायीं कांहीं अन्याय आहे काय ?
माझ्या तोंडाला अधर्माची रुचि कळत नाहीं काय ?

७

१ ह्या जगांत मनुष्याला कष्ट करण्याची मुदत ठेविली आहे ना ?
एकाद्या मजुराप्रमाणें त्याला दिवस कंठावे लागतात ना ?
२ आपल्याला सावलींत कधीं बसावयास मिळेल म्हणून दास उत्कंठित होतो,
मजूर आपल्या वेतनाची वाट पाहतो,
३ त्याप्रमाणें निराशेंत महिन्यांचे महिने मला घालवावयाचे आहेत,
कष्टाच्या रात्री माझ्या वांट्याला आहेत.
४ मी पडलों असतां म्हणतों,
मी केव्हां उठेन ? रात्र केव्हां निघून जाईल ?
दिवस उजाडेपर्यंत मी एकसारखा तळमळत राहतों.
५ माझा देह किड्यांनीं व मातीच्या ढेकळांनीं भरला आहे;
माझी त्वचा बरी होते तों ती पुनः फुटून चिडचिडते.
६ माझे दिवस साळ्याच्या धोट्यापेक्षां त्वरित जातात;
ते निराशेनें निघून जातात.
७ माझा प्राण केवळ वायु आहे,
माझ्या डोळ्यांला पुनः कल्याण दिसावयाचें नाहीं,
हें लक्षांत आणा.
८ जो मला आतां पाहत आहे
त्याच्या डोळ्यांना मी पुनः दिसणार नाहीं;
तुझे नेत्र माझा शोध करितील पण मी नसणार.
९ मेघ ज्याप्रमाणें वितळून नाहींसा होतो,
तसा अधोलोकांत जाणारा परत वर येत नाहीं.
१० तो पुनः आपल्या घरीं येणार नाहीं,
त्याचें स्थान त्याला पुनः ओळखणार नाहीं.

११ यामुळें मी आपलें तोंड आटोपणार नाहीं;
मी आपल्या मनाचा खेद उघड करून सांगेन;
माझ्या जिवास क्लेश होतात म्हणून मी गाऱ्हाणें करीन.
१२ मी काय सागर किंवा समुद्रांतला राक्षस आहें
म्हणून तूं मजवर सक्त नजर ठेवितोस !
१३ माझा बिछाना मला शांति देईल,
माझा पलंग माझा खेद कांहीं हलका करील असें मी म्हणतों;
१४ तेव्हां तूं मला स्वप्नें पाहून घाबरें करितोस,
मला दृष्टांत दाखवून भयभीत करितोस;
१५ म्हणून माझा गळा दाबून मला मारिलें तरी माझ्या जिवास पुरवेल;
माझ्या या अस्थिपंजरापेक्षां मला मरण पुरवेल.
१६ मला आपल्या जिवाचा वीट आला आहे; सर्वकाळ जगणें मला नको.
माझें नांव सोडून दे, कारण माझे दिवस श्वासवत् आहेत.
१७ मानव तो काय कीं तूं त्याला थोर मानावें,
आपलें चित्त त्याजवर ठेवावें,
१८ रोज सकाळीं त्याचा समाचार घ्यावा,
व क्षणोक्षणीं त्याची कसोटी पाहावी ?
१९ तूं मजवरची आपली नजर काढीत नाहींस,
आवंढा घोटावयालाहि अवसर देत नाहींस,
असें कोठवर चालणार ?
२० हे मानवरक्षका ! मीं पाप केलें असलें तर त्यांत तुझें काय गेलें ?
तूं मला आपलें निशाण कां करून ठेविलें आहे ?
मी आपणाला भार मात्र झालों आहें.
२१ तूं माझा अपराध कां क्षमा करीत नाहींस ?
माझ्या ठायींचा दोष कां घालवीत नाहींस ?
आतां तर मी धुळींत पडून राहणार;
तूं माझा पुष्कळ शोध करिशील पण मी नसणार.

१ मग बिल्दद शूही म्हणाला,
८ २ तूं असल्या गोष्टी कोठवर बोलत राहशील ?
सोसाट्याच्या वाऱ्यासारखें तुझें तोंड कोठवर चालणार ?
३ देव निर्णय विपरीत करील काय ?
जो सर्वसमर्थ तो न्याय्यता विपरीत करील काय ?
४ तुझ्या मुलांनीं त्याच्याविरुद्ध पाप केलें,
म्हणून त्यानें त्यांस त्यांच्या अपराधांचें फळ भोगावयास लाविलें आहे.
५ जर तूं देवाचा धावा केला,
सर्वसमर्थाची करुणा भाकिली,
६ तूं शुद्ध व सरळ असलास,
तर खात्रीनें तो तुझ्या हितास जागेल,
तुझा निर्दोष निवास यथापूर्वक करील.
७ तुझा आरंभ अल्प असला
तरी तुझा शेवट समृद्धीचा होईल.
८ मागल्या पिढीच्या लोकांस विचार,
त्यांच्या वडिलांनीं जो शोध लाविला त्याकडे लक्ष दे.
९ (आपण तर कालचे,
आपणांला कांहीं अनुभव नाहीं,
कारण पृथ्वीवरचे आपले दिवस छायारूप आहेत;)
१० ते तुला शिकविणार व सांगणार नाहींत काय ?
ते आपलें हृद्गत तुला कळविणार नाहींत काय ?
११ लव्हाळा चिखलावांचून वाढतो काय ?
लव्हाळा पाण्यावांचून उगवतो काय ?
१२ तो हिरवाचार असून कापलाहि नाहीं,
तरी तो इतर सर्व प्रकारच्या हिरवळीच्या अगोदर सुकून जातो.
१३ देवास विसरून जाणाऱ्यांची गति अशीच आहे;
भक्तिहीनाची आशा मावळते;
१४ त्याच्या आशेचा भंग होतो;
ज्यावर त्याची भिस्त असते तें कोळ्याच्या

जाल्यासारखें ठरतें.
१५ तो आपल्या घरावर टेकला असतां तें टिकावयाचें
नाहीं;
त्यानें तें घट्ट धरिलें असतां तें स्थिर राहावयाचें
नाहीं.
१६ तो सूर्यप्रकाशांत टवटवीत होतो,
त्याच्या फांद्या बागभर पसरतात.
१७ त्याचीं मुळें खड्यांच्या राशींना वेष्टितात,
तो खडकाळ जमिनींत घुसतो.
१८ त्याला त्या जागेंतून उपटून नष्ट केलें
तर ती त्याची ओळख टाकून म्हणेल,
मीं तुला कधीं पाहिलें नाहीं.
१९ पाहा, त्याच्या जीविताचा हाच काय तो आनंद !
त्याच्यामागें असेच दुसरे जमिनींतून उगवतील.
२० पाहा, देव सात्त्विक मनुष्याचा अव्हेर करीत नाहीं,
तो कुकर्म्यांला हातीं धरीत नाहीं.
२१ तुला तर तो हसतमुख करील,
तुझ्या तोंडून जयजयकार करवील.
२२ तुझे वैरी लज्जेनें व्याप्त होतील;
दुष्टांची राहुटी नाहींशी होईल.

९ १ तेव्हां ईयोब म्हणाला,
२ खरोखर हें असेंच आहे हें मला ठाऊक आहे;
पण मानव देवापुढें कसा नीतिमान् ठरेल ?
३ तो देवाशीं वाद करूं लागला
तर हजार गोष्टींतल्या एकीचेंहि उत्तर त्याला देतां
येणार नाहीं.
४ तो मनानें सुज्ञ व सामर्थ्यानें प्रबल आहे;
त्याच्याशीं विरोध करून कोण टिकला आहे ?
५ तो पर्वतांस नकळत अचानक हटवितो,
तो आपल्या क्रोधानें त्यांस उलथून टाकितो.
६ तो पृथ्वीस कांपवून तिला स्थानभ्रष्ट करितो,
तिचे आधारस्तंभ थरारतात.
७ त्याची आज्ञा झाली असतां सूर्य उगवत नाहीं;
तो तार्‍यांस मोहरबंद करितो.
८ तोच आकाशमंडळ विस्तारितो,
तो समुद्राच्या पर्वतप्राय लहरींवरून चालतो.
९ त्यानेंच सप्तर्षि, मृगशीर्ष, कृत्तिका,
व दक्षिणेकडील नक्षत्रमंडळें उत्पन्न केलीं.[1]
१० तो अतर्क्य महत्कृत्यें,
अगणित अद्भुत कृत्यें करितो.
११ पाहा, तो माझ्याजवळून जातो तरी मला दिसत
नाहीं;
तो निघून जातो तरी तो माझ्या दृष्टीस
पडत नाहीं.
१२ तो हिसकावून घेऊं लागला तर त्याचा हात
कोण धरील ?
तूं हें काय करितोस, असें त्याला कोण म्हणणार ?
१३ देव आपला क्रोध आवरीत नाहीं;
राहाबाचे सहकारी त्याच्यापुढें दबून असतात.
१४ तर मीं त्याला उत्तर द्यावें,
आणि शब्दांची योग्य निवड करून त्याच्याशीं वाद
करावा,
असा मी कोण आहें ?
१५ मी निर्दोष असतों तरी त्याला मी उत्तर न देतों.
त्या माझ्या प्रतिवाद्याची मी विनवणी करितों.
१६ मीं धावा केला असता तर त्यानें उत्तर दिलें असतें;
तरी त्यानें माझें ऐकलेंच अशी माझी खात्री
झाली नसती.
१७ कारण तो वादळानें माझा चुराडा करितो,
विनाकारण मला घायावर घाय करितो.
१८ तो मला श्वासहि घेऊं देत नाहीं,
तो मला क्लेशानें व्यापून टाकितो.
१९ बलवान् कोण ? असा प्रश्न निघाल्यास तो म्हणतो,
मी आहें.
न्यायाचा प्रश्न निघाल्यास तो म्हणतो,
मला न्यायसभेपुढें कोण आणील ?
२० मी निरपराध असलों तरी माझें तोंड मला
अपराधीच ठरवील;

[1] अ० ३८:३१ पाहा.

मी निर्दोष असलों तरी तो मला दोषीच ठरवील.
२१ मी निर्दोष आहें तरी माझें मला कांहीं कळत नाहीं;
माझा जीव मला नकोसा झाला आहे.
२२ हें कसेंहि असो, एकूण एकच; म्हणून मी म्हणतों,
देव निर्दोष्याचा तसाच दुष्टाचाहि नाश करितो.
२३ अकस्मात् अरिष्ट येऊन संहार होत असतां
तें निर्दोष्याच्या संकटाला असतें.
२४ पृथ्वी दुष्टाच्या हातीं दिली आहे,
देव तिच्या शास्त्यांचीं मुखें झांकितो;
ही त्याची करणी नव्हे तर दुसऱ्या कोणाची?
२५ माझे दिवस जासुदाहून त्वरित जात आहेत;
ते पळत आहेत, त्यांत कांहीं कल्याण दिसत नाहीं.
२६ ते वेगवान् तारवांसारखे,
आपल्या भक्ष्यावर झडप घालणाऱ्या गरुडासारखे निघून जात आहेत.
२७ विलाप करण्याचें मीं विसरावें,
मुखाची खिन्नता सोडून उल्हासी दिसावें
असें मीं मनांत आणिलें;
२८ तरी माझ्या ह्या सर्व दुःखांनीं मी घाबरून जातों.
तूं मला निर्दोषी ठरविणार नाहींस हें मला ठाऊक आहे.
२९ मी दोषी ठरणारच;
तर मग मी हा व्यर्थ खटाटोप कां करूं?
३० माझें अंग बर्फानें धुतलें,
माझे हात खारानें स्वच्छ केले,
३१ तरी तूं मला खाड्यांत टाकिशील,
माझीं वस्त्रें देखील माझा धिक्कार करितील.
३२ मी त्याजशीं वाद करावा,
आम्हीं एकमेकांत लढा माजवावा,
असा तो माझ्यासारखा मानव नाहीं.
३३ आम्हां दोघांवर हात ठेवील,
असा कोणी मध्यस्थ आम्हां उभयतांमध्यें नाहीं.
३४ तो मजवरला सोटा दूर करो,
त्याचा धाक मला घाबरें न करो,
३५ म्हणजे मी त्याजशीं बोलेन, त्याला भिणार नाहीं;
कारण मी आपणास तसा समजत नाहीं.

१० १ माझ्या आत्म्याला जीविताचा कंटाळा आला आहे;
मी आपलें गाऱ्हाणें एकसारखें चालू ठेवीन;
माझ्या जिवाला क्लेश होत आहे म्हणून मी बोलेन.
२ मी देवाला म्हणेन, मला दोषी लेखूं नको;
तूं मजशीं विरोध कां करितोस हें मला सांग.
३ तूं मला छळितोस;
आपल्या हातच्या बनलेल्या वस्तूस तुच्छ लेखून
दुष्टांच्या मसलतीला प्रसन्न होतोस,
हें तुला उचित वाटतें काय?
४ तुला चर्मचक्षु आहेत काय?
तुझी दृष्टि मर्त्य मानवाच्यासारखी आहे काय?
५ तुझे दिवस मर्त्य मानवाच्यासारखे,
तुझीं वर्षें मनुष्याच्यासारखीं आहेत;
६ म्हणून तूं माझा अधर्म शोधितोस,
माझें पाप हुडकितोस काय?
७ तुला तर ठाऊक आहेच कीं मी दुष्ट नाहीं;
तुझ्या हातून सोडविणारा कोणी नाहीं.
८ तुझ्या हातांनीं मला घडिलें आहे;
त्यांनीं सर्वतोपरी मला बनविलें आहे,
तरी तूं माझा नाश करीत आहेस.
९ तूं मला मातीच्या घड्याप्रमाणें घडिलें आहे हें मनांत आण;
तर पुनः मला मातीस मिळवूं पाहतोस काय?
१० तूं मला दुधासारखें ओतून
दह्याप्रमाणें विरजविलें नाहीं काय?
११ त्वचा व मांस यांचें पांघरूण तूं मला घातलें,
अस्थि व स्नायु ओवून मला बनविलें.
१२ तूं मला जीवन दिलें व मजवर प्रसाद केला,
तुझ्या निगेनें माझा प्राण सुरक्षित राहिला.

१ मुळांत : लव्हाळ्यांच्या तारवांसारखे.

१३ तरी तूं आपला हा उद्देश मनांत लपवून ठेविला;
तुझ्या मनांत काय होतें तें आतां मला समजलें;
१४ मी पाप केलें तर तें ध्यानांत ठेवून
माझ्या अधर्माची तूं मला क्षमा करणार नाहींस;
१५ मी दुष्ट झालों तर मला हायहाय करावी लागेल. मी धार्मिक झालों तरी लज्जेनें व्याप्त होऊन
माझी विपत्ति पाहून मी आपलें डोकें वर करणार नाहीं.
१६ माझें डोकें वर झालें कीं तूं सिंहासारखा माझ्या पाठीस लागणार;
तुझ्या अद्भुत शक्तीचा मजवर पुनः पुनः प्रयोग करणार.
१७ तूं मजविरुद्ध आपले नवेनवे साक्षीदार आणणार;
तूं मजवरचा आपला क्रोध द्विगुणित करणार;
तूं मजवर सैन्यामागून सैन्य पाठविणार.
१८ तूं मला मातेच्या उदरांतून कां बाहेर आणिलें ?
बाहेर आणिलें नसतें तर मी प्राणास मुकलों असतों,
कोणाच्या दृष्टीस मी पडलों नसतों.
१९ मी जन्मास येऊन न आल्यासारखा झालों असतों;
मी गर्भावस्थेंतूनच कबरेंत गेलों असतों;
२० माझे दिवस थोडे नव्हत काय ?
तर मला सोड,
मजवरची आपली दृष्टि काढ,
म्हणजे माझ्या मनाला थोडें चैन पडेल;
२१ मग जेथून परत येणें नाहीं
अशा अंधाराच्या, मृत्यूच्या प्रदेशांत मी जाईन;
२२ जेथें काळोख, निबिड अंधकार आहे,
अशा मृत्युच्छायेच्या अस्ताव्यस्त प्रदेशांत मी जाईन;
तेथला प्रकाश अंधकारच होय.

११

१ मग सोफर नामाथी म्हणाला,
२ ह्या शब्दांचा पूर उत्तर दिल्यावांचून राहूं द्यावा काय ?
वाचाळ खरा ठरावा काय ?
३ तुझ्या बटबटीनें लोकांचीं तोंडें बंद होतील काय ?
तूं निंदा करीत असतां तुला कोणी फजीत करावयाचा नाहीं काय ?
४ तूं म्हणतोस, माझा सिद्धांत शुद्ध आहे;
देवाच्या दृष्टीनें मी स्वच्छ आहें;
५ देव जर बोलता,
तुजविरुद्ध आपलें तोंड उघडिता,
६ तो ज्ञानाचें रहस्य तुला निवेदन करिता,
आपलें चातुर्य बहुगुणित आहे हें तुला तो दाखविता
तर किती बरें होतें !
देव तुझ्या बहुत अपराधांकडे कानाडोळा करितो हें लक्षांत आण.
७ देवाच्या रहस्याचा तुला थांग लागेल काय ?
सर्वसमर्थाच्या पूर्णतेचें तुला आकलन होईल काय ?
८ तें गगनाइतकें उंच आहे, तेथें तुझें काय चालणार ?
तें अधोलोकाहून खोल आहे, तुला तें काय कळणार ?
९ त्याचें परिमाण म्हटलें तर
तें भूगोलाहून लांब व समुद्राहून रुंद आहे.
१० भ्रमण करीत असतां त्यानें एकाद्यास पकडून अटकेंत टाकिलें,
आणि न्यायसभा भरविली, तर त्याचा हात कोण धरील ?
११ आचारशून्य मनुष्यांस तो ओळखितो;
विचार करावा न लागतां त्याला दुष्टता दिसून येते.
१२ रानगाढवाचा मनुष्य बनेल
तर अकलशून्य मनुष्याला समज प्राप्त होईल.
१३ आपलें हृदय नीट करिशील,
देवाकडे आपले हात पसरिशील,
१४ तुझ्या हातीं असलेला अधर्म तूं दूर करिशील,
आपल्या डेऱ्यांत अन्याय राहूं देणार नाहींस,

१५ तर निश्चयें तूं आपलें निष्कलंक मुख वर करिशील;
तूं स्थिर होशील, निर्भय होशील;
१६ कारण तूं आपलें दुःख विसरशील;
ओसरलेल्या पाण्यासारखें तुला तें आठवेल;
१७ तुझें जीवित मध्यान्हसमयाहून तेजस्वी होईल;
अंधकार असला तरी तो प्रभातेसारखा होईल.
१८ तुला उमेद प्राप्त झाल्यानें तूं निर्भय होशील;
तूं चोहोंकडे पाहून निर्धास्त आराम करिशील.
१९ तूं झोपीं जाशील तेव्हां तुला कोणी भिव-
विणार नाहीं;
बहुत लोक तुझें आर्जव करितील.
२० दुष्टांचे डोळे थकतील;
त्यांस कोणतें शरणस्थान राहणार नाहीं;
प्राण सोडणें एवढीच कायती त्यांना आशा वाटेल.

१२ १ मग ईयोबानें प्रत्युत्तर केलें,
२ खरेंच, तुम्हीच कायते मानवप्राणी;
तुम्ही मेलां कीं ज्ञान नष्ट झालेंच.
३ मलाहि तुमच्यासारखी बुद्धि आहे;
मी कांहीं तुमच्याहून कमी नाहीं;
अहो, असल्या गोष्टी कोणास ठाऊक नाहींत ?
४ मी देवाचा धावा करीं व तो माझें ऐके,
त्यामुळें मला माझ्या शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं हसावें ना !
धार्मिक व सात्त्विक मनुष्याला हसावें ना !
५ सुखी मनुष्याच्या मतें विपत्ति तिरस्कारास
पात्र आहे;
ज्यांचे पाय लटपटतात त्यांचा तिरस्कार
तत्काळ होतो.
६ लुटारूंचे डेरे समृद्ध असतात,
जे देवाला चेतवितात ते निर्भय राहतात,
ते आपल्या हातालाच आपला देव समजतात.[1]
७ तूं पशूंस विचार, ते तुला शिकवितील;
आकाशांतील पक्ष्यांस विचार, ते तुला समजा-
वून देतील;
८ अथवा पृथ्वीशीं बोल, ती तुला शिकवील;
समुद्रांतील मत्स्य तुला सांगतील.
९ परमेश्वराच्या[1] हातानें हें घडलें आहे
असें ह्या सर्वांवरून कोणाला समजावयाचें नाहीं
१० त्याच्याच हातीं सर्व प्राण्यांचा जीव,
सर्व मानवजातीचा प्राण आहे.
११ जीभ अन्नाची रुचि घेते,
तसा कान शब्दाची पारख करीत नाहीं काय ?
१२ वृद्धाच्या ठायीं ज्ञान असतें;
दीर्घायु मनुष्याच्या ठायीं समज असतो.
१३ त्याच्या ठायीं ज्ञान व बल हीं आहेत;
युक्ति व समज हीं त्याचींच आहेत.
१४ पाहा, तो जें मोडितो तें पुनः उभारितां
येत नाहीं;
त्यानें एकाद्याला बंधांत ठेविलें तर त्याला कोणा-
च्यानें खुलें करवत नाहीं.
१५ पाहा, तो जलवृष्टि आवरितो आणि सर्व पाणी
आटून जातें;
ती तो सोडितो आणि तीमुळें पृथ्वी उद्ध्वस्त होते.
१६ सामर्थ्य व चातुर्य हीं त्याला आहेत;
भ्रांत होणारा व भ्रांत करणारा हे त्याच्या
सत्तेंत आहेत.
१७ तो राजमंत्र्यांस अनवाणी नेऊन जातो;
तो न्यायाधीशांस मूढ ठरवितो.
१८ तो राजांची सत्ता मोडितो,
त्यांच्या कमरेस बंधन लावितो.
१९ तो याजकाला अनवाणी नेऊन जातो;
स्थिरपदीं असलेल्यांस तो उलथून टाकितो.
२० तो भरवशाच्या मनुष्यांचीं तोंडें बंद करितो,
वृद्धांचा विवेक हरण करितो.
२१ तो सरदारांवर उपहासाचा वर्षाव करितो,
प्रबलांचा कमरबंद सैल करितो.
२२ तो गूढ गोष्टी अंधकारांतून काढून प्रगट करितो;
तो मृत्युच्छायेला प्रकाशांत आणितो.

१ अथवा: त्यांच्या हातीं देव भरपूर देतो.

१ देवाच्या.

२३ तो राष्ट्रांची समृद्धि करून मग त्यांचा विध्वंस
करितो;
तो राष्ट्रांचा विस्तार करून मग त्यांचा
संकोच करितो.
२४ तो पृथ्वीवरील लोकनायकांची बुद्धि हरण
करितो,
त्यांस मार्गरहित वैराण प्रदेशांत भटका-
वयास लावितो.
२५ त्यांना प्रकाश नाहींसा होऊन ते अंधकारांत
चाचपडत असतात;
तो त्यांस मद्यप्यासारखे झोकांडे खावयास
लावितो.

१३ १ पाहा, हें सर्व माझ्या डोळ्यांनीं पाहिलेंच
आहे, माझे कान हें ऐकून समजलेच आहेत.
२ तुम्हांला कळतें तें मलाहि कळतें;
मी कांहीं तुमच्याहून कमी नाहीं.
३ खचीत मी सर्वसमर्थाशीं बोलणार;
मी देवापुढें वाद चालवूं इच्छितों.
४ तुम्ही तर लबाड्या प्रसृत करणारे आहां;
तुम्ही सर्व कवडीमोल वैद्य आहां.
५ अहो ! तुम्ही अगदीं गप्प राहाल तर बरें;
यांत तुमचा शहाणपणा दिसेल.
६ आतां माझें म्हणणें ऐकून घ्या;
माझ्या तोंडच्या प्रतिवादाकडे कान द्या.
७ काय ? तुम्ही देवाच्या पक्षानें विपरीत भाषण
करितां ?
त्याच्या पक्षानें कपटभाषण करितां ?
८ तुम्ही त्याचे पक्षपाती होणार काय ?
देवाची वकिली करणार काय ?
९ तुमची त्यानें पारख केली तर तें तुम्हांस बरें
वाटेल काय ?
मनुष्य मनुष्याला फसवितो तसें तुम्ही त्याला
फसवाल काय ?
१० तुम्ही कपटानें पक्षपात कराल
तर तो खात्रीनें तुमचें करणें उघडकीस आणील.
११ त्याच्या माहात्म्यानें तुम्ही घाबरे होणार नाहीं काय ?
त्याचा धाक तुम्हांला वाटणार नाहीं काय ?
१२ हीं कर्णोपकर्णीं आलेलीं तुमचीं वचनें केवळ
राखेच्या म्हणी होत;
तुमचे कोट केवळ मातीचे होत.
१३ गप्प राहा, माझ्याआड येऊं नका म्हणजे मी
बोलेन;
मग काय होईल तें होवो.
१४ मीं आपलें मांस दांतीं कां धरावें ?
मी आपला प्राण मुठींत कां धरावा ?
१५ तो मला ठार मारणार तरी मी त्याची आस
धरीन;
माझ्या वर्तनक्रमाचें त्याजसमोर मी समर्थन करीन.
१६ यांतच माझें तारण होईल;
कारण भक्तिहीन त्याच्यासमोर येणार नाहीं.
१७ अहो, चित्त देऊन माझें भाषण ऐका;
माझें म्हणणें तुमच्या कानीं पडूं द्या.
१८ आतां पाहा, मीं आपल्या दाव्याची पुरी तयारी
केली आहे;
मी निर्दोष ठरेन हें मला माहीत आहे.
१९ माझा कोण प्रतिवादी होईल ?
कोणी झाला तर मी गप्प राहून प्राण सोडीन.
२० मला दोनच गोष्टी मात्र करूं नको,
म्हणजे मग मी तुजपासून तोंड लपविणार नाहीं.
२१ मजवरला आपला हात काढ,
आणि मला धाक घालून घाबरें करूं नको.
२२ मला बोलाव, म्हणजे मी बोलेन,
नाहीं तर मी बोलतों आणि मग तूं त्याचें उत्तर दे.
२३ माझीं अधर्मकृत्यें व माझीं पातकें किती आहेत !
माझा अपराध व माझें पाप मला दाखवून दे.
२४ तूं आपलें तोंड कां लपवितोस ?
मला आपला वैरी कां लेखितोस ?
२५ इकडून तिकडे उडणाऱ्या पानाचा पिच्छा पुर-
वितोस काय ?

१ अथवा: मारणार; मी त्याची वाट पाहणार नाहीं.

शुष्क भुसाच्या पाठीस लागतोस काय?
२६ तूं माझ्या नांवावर कठीण शिक्षा लिहितोस,
माझ्या तारुण्यांतील पातकांचें फळ मला भोगावयास लावितोस.
२७ तूं माझे पाय खोड्यांत घालितोस
आणि माझ्या सगळ्या चालचलणुकीवर नजर ठेवितोस;
तूं माझ्या पावलांभोंवतीं रेषा मारितोस.
२८ मी सडलेल्या वस्तूप्रमाणें,
कसरीनें खाल्लेल्या वस्त्राप्रमाणें जीर्ण झालों आहें.

१४ १ स्त्रीपासून जन्मलेला मानवप्राणी अल्पायु व क्लेशभरित असतो.
२ तो फुलासारखा फुलतो व खुडला जातो;
तो छायेप्रमाणें सत्वर निघून जातो, राहत नाहीं.
३ अशावर तूं डोळा ठेवितोस काय?
अशा मला तूं आपल्या न्यायासनासमोर नेतोस काय?
४ अमंगळांतून कांहीं मंगळ निघतें काय? अगदीं नाहीं.
५ मानवाच्या आयुष्याची मर्यादा ठरलेली आहे;
त्याच्या महिन्यांची संख्या तुझ्या स्वाधीन आहे;
तूं त्याच्या आयुष्याची मर्यादा नेमिली आहे,
ती त्याला ओलांडितां येत नाहीं;
६ म्हणून त्याजवरची आपली दृष्टि काढ व त्याला चैन पडूं दे;
मजूर रोज भरितो तसे त्याला आपले दिवस भरूं दे.
७ वृक्षांची कांहीं तरी आशा असते; तो तोडिला तरी पुनः फुटतो;
त्याला धुमारा फुटावयाचा राहत नाहीं.
८ जमिनींत त्याचें मूळ जून झालें असलें,
त्याचें खोड मातींत सुकून गेलें असलें,
९ तरी पाण्याच्या वासानें तें पुनः फुटतें,
नव्या रोप्याप्रमाणें त्यास फांद्या येतात;
१० पण मनुष्य मेला म्हणजे तो तसाच पडून राहतो;
मनुष्यानें प्राण सोडिला म्हणजे तो कोठें असतो?
११ समुद्राचें पाणी आटून जातें,
नदी आटून कोरडी होते;
१२ तसा मनुष्य पडला म्हणजे पुनः उठत नाहीं;
आकाशाचा विलय होई तोंवर तो जागृत होणार नाहीं;
आणि त्याला झोपेंतून कोणी जागें करणार नाहीं.
१३ तूं मला अधोलोकांत लपविशील,
तुझा क्रोध शमेपर्यंत मला दृष्टीआड ठेविशील,
माझी मुदत नियमित करून मग माझी आठवण करिशील,
तर किती बरें होईल!
१४ मनुष्य मृत झाल्यावर पुनः जीवंत होईल काय?
माझी सुटका होईपर्यंत कष्टमय सेवेचे सगळे दिवस मी वाट पाहत राहीन.
१५ तूं मला हाक मारिशील व मी तुला उत्तर देईन;
मी जो तुझ्या हातची कृति त्या मजविषयीं तुला उत्कंठा लागेल;
१६ पण सध्यां तूं माझें एकएक पाऊल मोजीत आहेस;
माझ्या पापावर तूं सक्त नजर ठेवीत आहेस ना?
१७ माझें पातक थैलींत घालून मोहरबंद केलें आहे;
माझा अधर्म तूं वज्रलेप करून ठेवितोस.
१८ पर्वत कोसळून कोसळून लय पावतो;
खडक आपल्या जागचा ढळतो;
१९ पाण्यानें पाषाण झिजतो;
त्याच्या पुरानें पृथ्वीवरील माती वाहून जाते;
त्याप्रमाणें तूं मनुष्याची आशाहि नष्ट करितोस.
२० तूं त्याला कायमचा जेरीस आणितोस, आणि तो गत होतो;
तूं त्याची चर्या बदलून त्याला घालवून देतोस.
२१ त्याच्या पुत्रांची उन्नति होते ती त्यास कळत नाहीं;
त्यांची अवनति होते ती त्यास दिसत नाहीं.
२२ त्याच्या देहाला दुःख होतें,
त्याचें अंतर्याम शोकाकुल होतें.

१५ १ मग अलीफज तेमानी म्हणाला,
२ सुज्ञ पुरुष पोकळ ज्ञानाच्या गोष्टी बोलेल काय ?
आपलें अंतर्याम पूर्वेच्या वाऱ्यानें भरील काय ?
३ निष्फळ शब्द बोलून, निरर्थक भाषणें करून
तो वादविवाद करील काय ?
४ तूं तर देवाचें भय सोडिलें आहे;
तूं देवचिंतनाचा संकोच करितोस.
५ तुझा अधर्म तुझ्या तोंडाला बोलावयास शिकवितो;
तुला धूर्ताप्रमाणें बोलणें आवडतें.
६ तुझेंच तोंड तुला दोषी ठरवीत आहे, मी नाहीं;
तुझ्याच मुखावाटे तुजविरुद्ध साक्ष निघत आहे.
७ पहिला पुरुष असा तूंच जन्मलास काय ?
पर्वतांपूर्वी तुझी उत्पत्ति झाली काय ?
८ देवाचें अंतस्थ रहस्य तुला कळलें आहे काय ?
अकलेचा मक्ता तूंच घेतला आहे काय ?
९ आम्हांला कळत नाहीं असें तुला काय ठाऊक आहे ?
आम्हांला अवगत नाहीं अशी तुला काय माहिती आहे ?
१० पिकलेल्या केसांचे, वयानें वृद्ध,
तुझ्या बापाहून अधिक वयाचे असे पुरुष आमच्यांत आहेत.
११ देवानें केलेलें सांत्वन आणि तुजशीं बोललेलीं सौम्य भाषणें
तुला तुच्छ वाटतात काय ?
१२ तुझें चित्त तुला कां भ्रांत करीत आहे ?
तूं डोळे कां फिरवितोस ?
१३ तुझ्या संतापाचा रोख देवाकडे कां ?
तूं आपल्या तोंडावाटे असले शब्द कां काढतोस ?
१४ मनुष्य निष्कलंक कोठून असणार ?
स्त्रीपासून जन्मलेला निर्दोष कोठून असणार ?
१५ पाहा, तो आपल्या पवित्र जनांचाहि विश्वास धरीत नाहीं;
आकाशहि त्याच्या दृष्टीनें निर्मळ नाहीं.
१६ तर जो पाण्यासारखें पातकाचें प्राशन करितो,
असल्या अमंगळ व भ्रष्ट मानवाची काय कथा !
१७ मी तुला समजावून सांगतों; माझें ऐकून घे;
मीं जें स्वतः पाहिलें आहे तें तुला निवेदन करितों;
१८ (ह्या गोष्टी ज्ञान्यांनीं आपल्या वाडवडिलांपासून ऐकून सांगितल्या,
गुप्त ठेविल्या नाहींत;
१९ त्यांसच कायतो देश दिला होता;
कोणा परक्याचा त्यांत प्रवेश होत नव्हता; )
२० दुर्जन जन्मभर आणि जुलमी मनुष्य
त्याची आयुष्यमर्यादा संपेपर्यंत यातना भोगितो.
२१ दहशतीचा शब्द त्याच्या कानांत घुमत असतो;
भरभराटीच्या काळांत विध्वंसक त्याजवर चालून येईल.
२२ अंधारांतून परत येण्याची त्याला आशा नसते;
तरवार त्यावर टपलेली असते.
२३ अन्नान्न करीत तो चोहोंकडे भटकतो.
अंधकारमय दिवस आपल्यासमीप आहे हें
त्याला ठाऊक आहे;
२४ संकट व क्लेश हीं त्याला घाबरीं करितात;
लढाईस सज्ज झालेल्या राजासारखीं तीं त्याला घेरितात;
२५ कारण त्यानें देवावर हात उचलिला आहे,
व सर्वसमर्थाशीं उद्दामपणा केला आहे.
२६ त्यानें आपली मान ताठ करून,
आपल्या ढालीचीं जाड बोटें पुढें करून त्याजवर हल्ला केला आहे;
२७ त्याच्या तोंडावर चरबी चढली आहे;
त्याच्या कमरेंत चरबी जमली आहे.
२८ ओसाड नगरांत, राहावयास अयोग्य अशा घरांत,
ओस व्हावें म्हणून सोडिलेल्या जागेंत तो राहत आहे.
२९ तो धनवान् व्हावयाचा नाहीं, त्याची मत्ता

टिकावयाची नाहीं;
त्यांचीं पिकें भारानें भूमीपर्यंत लवणार नाहींत.
३० अंधारांतून त्याची सुटका होणार नाहीं;
ज्वाला त्याच्या फांद्या सुकवील;
तो देवाच्या मुखश्वासानें नाहींसा होईल.
३१ त्यानें स्वतांस फसवून निरर्थक गोष्टीवर भरवसा ठेवूं नये;
कारण अनर्थ हेंच त्याला प्रतिफळ मिळेल.
३२ त्याचा काळ येण्यापूर्वींच तें तो भोगील;
त्याची झावळी हिरवी राहणार नाहीं.
३३ द्राक्षांप्रमाणें त्याचीं अपक्व फळें झडतील;
जैतून झाडाच्या फुलांप्रमाणें त्याचीं फुलें गळतील.
३४ धर्महीनाचा परिवार फलहीन होईल;
लांच घेणाऱ्यांचे डेरे अग्नि भक्षील.
३५ त्यांस अपकाराचा गर्भ राहून ते अरिष्टास जन्म देतात;
त्यांच्या पोटांत कपट उद्भवतें.

१६ १ मग ईयोबानें प्रत्युत्तर केलें,
२ असल्या गोष्टी मीं पुष्कळ ऐकल्या आहेत;
तुम्ही सगळे भिकार सांत्वनकर्ते आहां.
३ असल्या वायफळ शब्दांचा कधीं शेवट होईल ?
प्रत्युत्तर करण्याची तुला कोठून स्फूर्ति झाली ?
४ तुमच्यासारखें मलाहि बोलतां येईल;
तुम्ही माझ्या ठिकाणीं असता तर मलाहि तुमच्यावर वाग्जाल पसरितां आलें असतें,
तुम्हांकडे पाहून मला आपलें डोकें हालवितां आलें असतें;
५ पण मीं तुम्हांस आपल्या मुखानें धीर दिला असता,
आपल्या स्फुरणाऱ्या ओठांनीं तुमचें सांत्वन केलें असतें.
६ मी बोललों तरी माझ्या शोकाचें शमन होत नाहीं;
मी गप्प राहिलों तरी माझें दुःख कोठें कमी होत आहे ?
७ पण त्यानें मला व्याकुळ केलें आहे;
तूं[1] माझ्या सर्व परिवाराचा विध्वंस केला आहे.
८ तूं मला पकडिलें आहे, हीच मजविरुद्ध साक्ष आहे;
माझा रोडपणा मजसमोर माझ्याविरुद्ध साक्षी असा उठला आहे.
९ त्यानें क्रोधाविष्ट होऊन मला फाडून टाकिलें आहे;
त्यानें मजशीं वैर मांडिलें आहे,
तो मजवर दांतओठ चावीत आहे;
माझा वैरी मजवर डोळे वटारीत आहे.
१० लोक मजकडे पाहून तोंडें विचकीत आहेत;
माझी निर्भर्त्सना करून ते माझ्या गालावर चापट्या मारीत आहेत;
ते एकत्र होऊन मजवर चालून आले आहेत.
११ देवानें मला अधर्म्यांच्या स्वाधीन केलें आहे.
दुष्कर्म्यांच्या हातीं दिलें आहे.
१२ मी सुखानें राहत असतां त्यानें माझा चुराडा केला आहे;
त्यानें माझी मानगुटी धरून मला आपटून माझे तुकडे केले आहेत;
मला त्यानें मारा करण्याचें निशाण केलें आहे.
१३ त्याचे बाण माझ्यासभोंवार उडत आहेत;
माझी गय न करितां त्यानें माझी कमर फोडिली आहे;
त्यानें माझें पित्त जमिनीवर पाडिलें आहे.
१४ खिंडारावर खिंडार पाडून तो मला भग्न करितो;
तो वीराप्रमाणें मजवर धावून आला आहे.
१५ मीं आपल्या त्वचेवर तरट शिविलें आहे.
मीं आपलें शृंग धुळींत लोळविलें आहे.
१६ रडून रडून माझें तोंड लाल झालें आहे;
माझ्या पापण्यांवर मृत्युच्छाया पडली आहे;
१७ माझ्या हातून कांहीं अन्याय झाला नाहीं;
माझी प्रार्थना शुद्ध भावाची आहे, तरी असें झालें.

[1] देवानें

१८ अगे पृथ्वी, माझें रक्त झाकून ठेवूं नको;
माझ्या आरोळीस कोठेंहि खंड न पडो.
१९ या क्षणीं माझा साक्षी स्वर्गांत आहे,
माझा कैवारी उर्ध्वलोकीं आहे.
२० माझे मित्र माझे उपहासक बनले आहेत;
पण देवासमोर माझे नेत्र अश्रु ढाळीत आहेत,
२१ यासाठीं कीं त्यानें देवाविरुद्ध मनुष्यातर्फे
व इष्टमित्रांविरुद्ध मानवपुत्रांतर्फे वाद करावा.
२२ कारण जेथून परत येतां येत नाहीं अशा मार्गानें
थोड्याच वर्षांनीं मी जाणार.

१७ १ माझा प्राणनाश होत आहे; माझे दिवस
संपले आहेत;
मला कबर कायती राहिली आहे.
२ लोकांच्या विटंबनेनें मला घेरिलें आहे,
त्यांचें चिजविणें माझ्या नेत्रांसमोर सतत
चालू आहे.
३ आतां हडप दे, तुझ्यामाझ्यामध्यें तूंच माझा
जामीन हो;
माझ्या हातावर हात मारील असा दुसरा
कोण आहे ?
४ कारण तूं त्यांच्या मनांत अकलेचा प्रवेश होऊं
दिला नाहीं;
म्हणून तूं त्यांचें वर्चस्व होऊं देणार नाहींस.
५ जो आपल्या मित्रांशीं दगा करून त्यांस लुटीप्रमाणें
परक्यांच्या हातीं देतो,
त्याच्या मुलांबाळांचे डोळे जातील.
६ त्यानें माझें नांव जनांत निंदाव्यंजक केलें आहे;
लोक माझ्या तोंडावर थुंकत आहेत.
७ माझे डोळे दुःखानें अंधुक झाले आहेत;
माझे सर्व अवयव छायारूप झाले आहेत.
८ हें पाहून सरळ मनाचे लोक चकित होतील;
निर्दोष जन भक्तिहीनामुळें क्रुद्ध होतील.
९ तरी धार्मिक आपला मार्ग धरून राहील,
निर्मळ हाताच्या मनुष्यास अधिकाधिक शक्ति
प्राप्त होईल;
१० पण तुम्ही सर्व पुनः वादास या;
तुमच्यामध्यें मला एकहि सुज्ञ आढळाव-
याचा नाहीं.
११ माझे दिवस आटपले आहेत;
माझे मनोरथ, माझ्या मनांतले विचार, निष्फळ
झाले आहेत.
१२ ते रात्रीला दिवस ठरवितात;
अंधकारापेक्षां प्रकाश जवळ आहे असें ते
म्हणतात.
१३ जर अधोलोक माझें निजधाम आहे, एवढीच
मला आशा आहे,
जर मी आपली शय्या अंधकारांत केली आहे,
१४ जर मी गर्तेस म्हणालों आहें, तूं माझा बाप;
किडीला म्हणालों आहें, तूं माझी आईबहीण;
१५ तर आतां मला आशा राहिली आहे कोठें ?
माझ्या आशेविषयीं म्हणाल तर ती कोणाला दिसेल ?
१६ ती अधोलोकाच्या अडसरांपर्यंत उतरेल,
तेव्हां मातींत एकदांचा विराम मिळेल.

१८ १ मग बिल्दद शूही म्हणाला,
२ तुम्ही कोठवर शब्द शोधून योजीत बसाल ?
तुम्ही समज घ्या, मग आम्ही बोलूं.
३ तुमच्या हिशोबीं आम्ही पशु कां ठरलों ?
तुमच्या दृष्टीनें आम्ही अशुद्ध कां झालों ?
४ अरे क्रोधानें स्वतांस फाडून टाकणाऱ्या,
तुजमुळें पृथ्वी ओस पडेल काय ?
खडक आपल्या ठिकाणचा ढळेल काय ?
५ तरी दुष्टाचा दीप मालवेल,
त्याच्या अग्नीची ज्वाला झळकणार नाहीं.
६ त्याच्या डेऱ्यांतल्या प्रकाशाचा अंधकार होईल,
त्याचा जामणदिवा विझून जाईल.
७ त्याच्या जोराच्या ढांगा संकोच पावतील,
त्याचीच युक्ति त्याचा निःपात करील.
८ तो आपल्याच पायांनीं जाळ्यांत अडकतो,
तो पाशांत पाऊल टाकीत आहे.

९ त्याची टांच सांपळ्यांत अडकते;
पाश त्याला धरून ठेवितो.
१० त्याच्यासाठीं पाश जमिनींत गुप्त ठेविला आहे;
त्याच्या मार्गांत सांपळा ठेविला आहे.
११ त्याला दहशत चोहोंकडून घाबरे करिते;
ती त्याचा पिच्छा पुरविते.
१२ त्याची शक्ति क्षुधिताप्रमाणें क्षीण होईल;
तो केव्हां पडेल याची अरिष्ट वाट पाहत आहे.
१३ तें त्याच्या शरीराचे अवयव तोडून खाईल;
मृत्यूचा ज्येष्ठ पुत्र त्याचे अवयव ग्रासील.
१४ ज्या डेऱ्याचा तो भरवसा धरी
त्यांतून त्याला ओढून काढितील;
त्याला भयाच्या राजापुढें हजर करितील.
१५ जे त्याचे नव्हत ते त्याच्या डेऱ्यांत वास करितील;
त्याच्या वसतिस्थानावर गंधक उधळितील.
१६ खालून त्याचें मूळ सुकेल,
व वरून त्याची डहाळी छाटितील.
१७ देशांतून त्याची आठवण बुजेल,
व पेठेंत त्याचें नांव राहणार नाहीं.
१८ ते त्याला प्रकाशांतून अंधकारांत लोटितील,
त्याला जगांतून पळवितील.
१९ त्याच्या लोकांत त्याचे कोणी पुत्रपौत्र आढळणार नाहींत;
त्याच्या बिऱ्हाडांत कोणी उरणार नाहीं.
२० त्याचा दुर्दिन पाहून पश्चिमेकडे राहणारे चकित होतील,
पूर्वेकडे राहणारे कंपित होतील.
२१ कुटिलाच्या निवासांचें असेंच निःसंशय होणार;
देवाला न ओळखणाऱ्याच्या स्थानाचें असेंच होणार.

१९

१ मग ईयोबानें प्रत्युत्तर केलें,
२ तुम्ही कोठवर माझ्या जिवास दुःख देणार ?
कोठवर आपल्या शब्दांनीं माझा चुराडा करणार ?
३ एवढ्यांत दहा वेळां तुम्हीं माझी अप्रतिष्ठा केली;
तुम्ही मजशीं निष्ठुरतेनें वागतां याची तुम्हांला लाज कशी वाटत नाहीं ?
४ मीं कांहीं चूक केलीच असली,
तर ती माझी मला.
५ तुम्ही मजवर खरोखर तोरा मिरविणार
आणि माझ्या पदरीं अप्रतिष्ठा घालणार,
६ तर हें लक्षांत ठेवा कीं देवानेंच माझा विपरीत न्याय केला आहे;
त्यानें मजवर आपलें जाळें टाकिलें आहे.
७ मी जुलूम ! जुलूम ! असें ओरडतों पण कोणी ऐकत नाहीं;
मी दाद मागतों पण मला न्याय मिळत नाहीं.
८ त्यानें माझा रस्ता अडविला आहे, मला पुढें जातां येत नाहीं;
त्यानें माझ्या मार्गावर अंधकार पाडिला आहे;
९ त्यानें माझें वैभव हरिलें आहे;
माझ्या डोक्यावरला मुकुट त्यानें काढिला आहे.
१० त्यानें मला चोहोंकडून भग्न केलें आहे; व मी आटोपलें आहे;
त्यानें वृक्षाप्रमाणें माझी आशा उपटून टाकिली आहे.
११ त्यानें मजवर आपला कोप भडकविला आहे;
तो मला आपल्या शत्रूंत गणीत आहे.
१२ त्याच्या फौजा जमून त्या मजवर मोर्चा लावीत आहेत;
त्यांनीं माझ्या डेऱ्याभोवतीं तळ दिला आहे.
१३ त्यानें माझ्या भाऊबंदांस मजपासून दूर केलें आहे;
माझ्या ओळखीपाळखीचे मला पारखे झाले आहेत.
१४ माझे आप्त मला अंतरले आहेत;
माझे इष्टमित्र मला विसरले आहेत.
१५ माझ्या घरचे दास व दासी मला परकें समजतात;
त्यांच्या दृष्टीनें मी विदेशी झालों आहें.
१६ माझ्या दासाला मी हाका मारितों तरी तो मला उत्तर देत नाहीं;
मला तोंडानें त्याचे आर्जव करावे लागतात.

१७ माझा श्वास माझ्या स्त्रीस अप्रिय वाटतो;
माझ्या सहोदरांस माझी किळस येते.
१८ पोरेसोरें देखील मला तुच्छ लेखितात;
मी उठावयास लागलों असतां माझी चेष्टा करितात.
१९ माझे सगळे जिवलग मित्र माझा तिटकारा करितात;
ज्यांवर मी प्रेम करीं ते मजवर उलटले आहेत.
२० माझें मांसचर्म जीर्ण होऊन हाडांला लागलें आहे;
मी केवळ दांतांच्या कातडीनिशीं बचावलों आहें.
२१ माझ्या मित्रांनों, मजवर दया कराहो, दया करा;
कारण देवाचा हात मजवर पडला आहे.
२२ देव करीत आहे तसा तुम्ही माझा छळ कां करितां ?
तुम्हीं असोशीनें माझें मांस कां तोडितां ?
२३ माझे शब्द लिहून काढिले,
ते ग्रंथांत लिहून ठेविले,
२४ लोखंडी कलमानें शिळेवर खोदून
त्यांत शिसें भरून ते कायमचे केले, तर किती बरें होईल !
२५ मला तर ठाऊक आहे कीं माझा उद्धारक जीवंत आहे;
तो अंतीं पृथ्वीवर उभा राहील;
२६ ही माझी त्वचा छिन्नभिन्न होऊन नष्ट झाली,
तरी मी देवाला देहविरहित पाहीन;
२७ त्याला मी स्वतः पाहीन,
अन्याचे नव्हत तर माझेच नेत्र त्याला पाहतील.
माझा अंतरात्मा झुरत आहे !
२८ ह्या सगळ्याचें मूळ माझ्या ठायींच आढळून आलें आहे,
म्हणून याचा छळ आपण कोणत्या प्रकारें करावा, असें तुम्ही म्हणाल,
२९ तर तुम्ही तरवारीचें भय धरा;
कारण क्रोधामुळें तरवारीनें शासन होतें,
यावरून न्याय आहे हें तुम्हांस समजावें.

२०

१ मग सोफर नामाथी म्हणाला,
२ माझे विचार मला उत्तर सुचवितात,
हें माझ्या ठायींच्या स्फूर्तीनें होत आहे.
३ माझ्या अप्रतिष्ठेला कारण होणारी निर्भर्त्सना मला ऐकणें प्राप्त झालें;
म्हणून माझ्या बुद्धीप्रमाणें माझें मन मला उत्तर सुचवितें.
४ मानवाची पृथ्वीवर स्थापना झाली
तेव्हांपासूनचा हा सनातन नियम तुला ठाऊक नाहीं काय ?
५ कीं दुर्जनाचा जयजयकार अल्पकालिक असतो;
अधर्म्याचा आनंद केवळ क्षणिक असतो.
६ त्याचें माहात्म्य गगनास जाऊन पोहंचलें;
त्याचें शिर मेघमंडळास जाऊन लागलें,
७ तरी त्याच्या विष्ठेप्रमाणें त्याचा कायमचा नाश होईल;
त्याला जे पाहत असत ते विचारितील, तो कोठें गेला ?
८ तो स्वप्नाप्रमाणें उडून जाईल, कोणाच्या हातीं सांपडणार नाहीं;
रात्रीच्या आभासाप्रमाणें त्याला घालवून देतील.
९ ज्या नेत्रांला तो दिसला त्यांला तो पुनरपि दिसणार नाहीं;
त्याच्या ठिकाणाला त्याचें पुनः दर्शन होणार नाहीं.
१० त्याचीं मुलेंबाळें गरिबांचें आर्जव करितील;
त्याचे हात त्यानें लुबाडलेलें वित्त परत करितील.
११ त्याच्या हाडांत तारुण्याचा जोम भरला आहे;
पण तो त्याच्याबरोबर मातीस मिळेल.
१२ दुष्टता त्याच्या जिभेला गोड लागली,
ती त्यानें जिभेखालीं दाबून ठेविली,
१३ ती त्यानें तशीच राखून ठेविली, सोडिली नाहीं,
आपल्या तोंडांतच धरून ठेविली,
१४ तरी त्याचें अन्न त्याच्या पोटांत पालटून
त्याचें त्याच्या ठायीं फुरशांचें विष बनेल.

१५ त्यानें धन गिळिलें होतें तें तो ओकून टाकील.
देव तें त्याच्या पोटांतून बाहेर काढील.
१६ तो फुरशांचें विष चोखील;
नागाचा दंश त्याचा प्राण हरण करील.
१७ त्याला नद्यांचे म्हणजे अर्थात् मधाचे, दूधदुभत्याचे प्रवाह व ओघ
यांचें दर्शन व्हावयाचें नाहीं.
१८ त्यानें श्रम करून मिळविलें तें त्यानें परत दिलें पाहिजे,
त्याला तें गिळून टाकितां येणार नाहीं;
त्यानें मिळविलेल्या धनाच्या मानानें त्याला आनंद लाभणार नाहीं.
१९ तो दुबळ्यांस चिरडून तसाच टाकून गेला आहे;
म्हणून त्यानें जबरीनें एखादें घर घेतल्यास तें त्याला वाढवून बांधितां येणार नाहीं.
२० त्याच्या मनाला तृप्ति म्हणून कधीं वाटली नाहीं,
म्हणून त्याला आपल्या कोणत्याहि इष्ट वस्तुनिशीं निभावून जातां येणार नाहीं.
२१ त्यानें ग्रासिलें नाहीं असें कांहीं राहिलें नाहीं,
म्हणून त्याची समृद्धि टिकावयाची नाहीं.
२२ आबादानीच्या काळींहि त्याला ददात पडेल;
प्रत्येक कंगालाचे हात त्याजवर पडतील.
२३ असें होईल कीं त्याच्या पोटाची भर करण्यास
देव त्याजवर आपला क्रोधाग्नि पाखडील;
त्याच्या वृष्टीचा[1] प्रवेश त्याच्या पोटांत होईल.
२४ लोखंडी शस्त्रापासून तो निभावला
तरी पितळी धनुष्य त्याला विंधून टाकील.
२५ तो तीर उपटून काढील, तो त्याच्या शरीरांतून बाहेर येईल;
चमकणारें शल्य त्याच्या पित्ताशयांतून बाहेर येईल; त्याला दहशत पडेल.
२६ त्याच्या निधीवर काळोख नेमिला आहे;
फुंकावा लागत नाहीं असा अग्नि त्याला ग्रासून टाकील;
त्याच्या डेऱ्यांत जें कांहीं उरलें असेल तेंहि तो स्वाहा करील.
२७ आकाश त्याचा अधर्म प्रगट करील;
पृथ्वी त्याजविरुद्ध उठेल.
२८ त्याच्या घरांतील संपदा चालती होईल;
देवाच्या क्रोधदिनीं ती धुऊन जाईल.
२९ देवाकडून नेमिलेला हा दुर्जनाचा वांटा आहे;
देवानें ठरविलेलें हें त्याचें वतन आहे.

२१ १ मग ईयोबानें प्रत्युत्तर केलें,
२ ऐका, अहो, माझें भाषण लक्षपूर्वक ऐका;
एवढ्यानेंच माझें तुमच्याकडून सांत्वन होईल.
३ मला बोलूं द्या म्हणजे मी बोलतों;
माझें बोलणें संपल्यावर खुशाल उपहास करा.
४ माझें गाऱ्हाणें मनुष्यासंबंधानें आहे काय?
मी अधीर कां नसावें?
५ मजकडे चित्त देऊन विस्मित व्हा.
आपल्या तोंडाला हात लावा.
६ मला आठवण झाली कीं मी घाबरा होतों;
माझ्या देहास कंप सुटतो.
७ दुष्ट कां जीवंत राहतात?
ते वयोवृद्ध कां होतात?
ते समृद्ध कां होतात?
८ त्यांच्यासमक्ष त्यांच्याबरोबर,
त्यांच्या डोळ्यांसमोर त्यांचीं मुलेंबाळें नांदतात.
९ त्यांचीं घरें सलामत व निर्भय असतात,
देवाचा दंड त्यांजवर पडत नाहीं.
१० त्यांचा बैल अवलाद उत्पन्न करितो; तो निष्फळ होत नाहीं; त्यांची गाय विते, गाभटत नाहीं.
११ ते आपल्या मुलांचा थवा बाहेर सोडितात,
त्यांचीं मुलें नाचतात बागडतात;
१२ ते डफ व वीणा यांवर गातात,
ते पाव्याचा नाद ऐकून उल्हास पावतात.
१३ ते आपले दिवस सुखसमाधानांत घालवितात,

[1] अथवा: तो अन्न खात असतां त्यावर त्याची वृष्टि होईल.

व सहज क्षणांत अधोलोकीं जातात.
१४ हेच लोक देवाला म्हणत असत कीं आम्हांपासून
दूर हो;
तुझ्या मार्गाची ओळख आम्हांस नको;
१५ सर्वसमर्थ कोण आहे कीं आम्हीं त्याची सेवा
करावी ?
त्याची विनवणी करून आम्हांस लाभ तो काय ?
१६ पाहा, त्यांची समृद्धि त्यांच्या हातीं नाहीं;
दुष्ट लोकांचे विचार मजपासून दूर असोत.
१७ दुष्टांचा दीप मालवला व त्यांजवर विपत्ति आली;
देवानें त्यांजवर कोप करून त्यांस दुःखाचे
वांटेकरी केलें;
असें कितीदा होतें ?
१८ वाऱ्यानें जसें भुसकट उडतें, तुफानानें जसें
भूस उडतें,
तसे ते नष्ट झाले, असें कितीदा घडतें ?
१९ तुम्ही म्हणाल कीं देव दुर्जनाच्या पापाचें प्रतिफळ
त्याच्या मुलांसाठीं राखून ठेवितो,
तर त्यानें त्यालाच त्याचें प्रतिफळ द्यावें, म्हणजे
त्याला त्याचा अनुभव घडेल.
२० तो आपल्याच डोळ्यांनीं आपला नाश पाहो;
तो सर्वसमर्थाच्या संतप्त कोपाचें प्राशन करो.
२१ कारण त्याच्या आयुष्याची मुदत तुटली
तर त्याच्यामागें त्याला आपल्या घराण्याची काय
परवा राहील ?
२२ स्वर्गातल्यांचाहि न्याय करणाऱ्या देवाला
कोणी ज्ञान शिकवील काय ?
२३ कोणी शक्तीच्या भरांत,
सुखसमाधानांत असतां मरतो.
२४ त्याच्या चरव्या दुधानें भरलेल्या असतात;
त्याच्या हाडांतील मज्जा रसरशीत असते.
२५ कोणी सौख्याचा अनुभव न घेतां
जिवाच्या कष्टदशेंत मरतो.
२६ ते दोघेहि बरोबर मातीस मिळतात,
कीटक त्यांस व्यापितात.
२७ पाहा, तुमचे मनोदय,
माझ्या अहिताच्या तुमच्या योजना मला ठाऊक
आहेत.
२८ तुम्ही म्हणतां, सरदाराचा वाडा कोठें राहिला
आहे ?
दुष्ट राहत असत तो डेरा कोठें टिकला आहे ?
२९ तुम्हीं देशाटन केलेल्यांस विचारिलें नाहीं काय ?
त्यांचे दाखले तुम्हांस पटले नाहींत काय ?
३० असें कीं अरिष्टाच्या दिवसासाठीं दुर्जन राखले जातात;
कोपदिनीं असे लोक निभावतात.
३१ त्याच्या वर्तनाविषयीं त्याच्या तोंडावर कोण
बोलेल ?
त्याच्या कृतकर्माचें प्रतिफळ त्याला कोण देईल ?
३२ त्याला कबरेंत पोंचवितील;
त्याच्या थडग्याची रखवाली करितील;
३३ दरींतलीं ढेकळें त्याला गोड लागतील;
जसे पूर्वींचे असंख्य लोक गेले
तसे सर्व लोक त्याच्यामागून जातील.
३४ तुमच्या उत्तरांत दगा भरलेला आहे,
तर तुम्ही माझें व्यर्थ सांत्वन कां करितां ?

२२ १ मग अलीफज तेमानी म्हणाला,
२ मनुष्याकडून देवाला कांहीं लाभ आहे
काय ?
सुज्ञ पुरुष स्वतांचाच लाभ करून घेतो.
३ तूं धार्मिक असलास तर तेणेंकरून सर्वसमर्थाला
कांहीं सुख होतें काय ?
तूं सात्विकतेनें वर्तलास तर त्याला कांहीं लाभ
होईल काय ?
४ तो तुझा भक्तिभाव पाहून तुझा निषेध करितो
व तुजशीं वाद चालवितो काय ?
५ तुझी दुष्टाई मोठी आहे;
तुझ्या अधर्माला अंत नाहीं, हें खरें ना ?
६ तूं विनाकारण आपल्या बंधूचें गहाण अड-

१ मुळांत : महिन्यांची

कवून ठेविलें;
उघड्यानागड्याचीं वस्त्रें तूं हिरावून घेतलीं.
७ थकल्याभागलेल्यास तूं पाणी दिलें नाहीं,
भुकेलेल्यास अन्न घातलें नाहीं.
८ जबरदस्ताच्या हातीं भूमि गेली;
प्रतिष्ठित पुरुषानेंच तींत वस्ती केली.
९ तूं विधवांस रिक्तहस्तें लावून दिलें,
पोरक्यांचे हात मोडून टाकिले;
१० म्हणूनच तुला चोहोंकडून पाशांनीं घेरिलें आहे;
भीतीनें तुला अकस्मात् घाबरें केलें आहे.
११ काळोख आणि महापूर तुला व्यापून टाकीत आहेत,
हें तुला दिसत नाहीं काय?
१२ देवाचा निवास उंच गगन आहे ना?
अतिशयित वरल्या ताऱ्यांकडे पाहा, ते किती
उंच आहेत!
१३ तूं म्हणतोस, देवाला काय कळतें?
दाट अंधाराच्या आडून तो कसा न्यायाविषयी
चालवील?
१४ निबिड मेघ त्यास आच्छादितात म्हणून त्यास
दिसत नाहीं;
आकाशमंडळांतच त्याचा संचार होतो.
१५ ज्या मार्गानें दुर्जन गेले
त्याच प्राचीन मार्गानें तूं जाणार काय?
१६ ते अकालीं उच्छेद पावले,
त्यांच्या पायांखालच्या भूमीचें विरघळून पाणी
झालें;
१७ ते देवाला म्हणाले, तूं आम्हांपासून दूर हो;
सर्वसमर्थ आमचें काय करणार?
१८ तरी त्यानें त्यांचीं घरें उत्तम पदार्थांनीं
भरिलीं होतीं;
दुष्टांची मसलत मजपासून दूर असो.
१९ हें पाहून सज्जन आनंद पावतात;
निर्दोष जन त्यांचा उपहास करून म्हणतात,
२० खरोखर आमच्या विरोध्यांचा उच्छेद झाला आहे;
अग्नीनें त्यांच्या संपत्तीचा शेष खाऊन टाकिला
आहे.
२१ त्याच्याशीं सख्य कर आणि शांति जोड;
अशानें तुझें कल्याण होईल.
२२ आतां त्याच्या तोंडचें धर्मशिक्षण घे,
त्याचीं वचनें आपल्या हृदयांत साठीव.
२३ तूं सर्वसमर्थाकडे वळलास, आपल्या डेऱ्यांतून
तूं अधर्म दूर केला,
तर तुझी पुनः उभारणी होईल.
२४ तूं आपलें सुवर्ण धुळींत टाक;
ओफीरचें सोनें ओढ्यांच्या गोट्यांत फेकून दे;
२५ म्हणजे सर्वसमर्थ तुला सुवर्ण
व राशींच्या राशी रुपें असा होईल.
२६ मग सर्वसमर्थाच्या ठायीं तूं आनंद पावशील,
तूं आपलें मुख देवासमोर वर करशील.
२७ तूं त्याची प्रार्थना केली म्हणजे तो तुझें ऐकेल;
आणि तूं आपले नवस फेडिशील.
२८ तूं संकल्प केला तर तो सिद्धीस जाईल;
तुझ्या मार्गांवर प्रकाश पडेल.
२९ त्या मार्गांनीं तुला खालीं जाण्याचा प्रसंग आला
तर तूं वर! वर! असेंच म्हणशील;
कारण देव नम्रदृष्टि मनुष्याचा बचाव करील.
३० जो निर्दोष नाहीं त्यालाहि तो वांचवितो;
तुझ्या हातांच्या निर्मलतेमुळें त्याचा बचाव होईल.

## २३

१ मग ईयोबानें प्रत्युत्तर केलें,
२ अजूनहि माझें गाऱ्हाणें हटवादाचें आहे;
त्याचा प्रहार माझ्या विलापाहून भारी आहे.
३ देव कोठें सांपडेल हें मला समजतें,
मी त्याच्या न्यायासनापाशीं जाऊन पोहंचतों,
तर किती बरें होतें!
४ मग माझी फिर्याद मी त्याच्यापुढें मांडितों;
माझ्या तोंडून भरपूर मुद्दे निघते.
५ तो मला काय उत्तर देता तें मला समजलें असतें;

१ मुळांत: त्यांचें

१ अथवा: कोणीं तुला खालीं पाडिलें तर

तो मला काय म्हणाला असता तें मीं लक्षांत
घेतलें असतें.
६ त्यानें आपलें मोठें बल खर्चून बरोबर वाद
केला असता काय ?
नाहीं; तर त्यानें माझी दाद घेतली असती.
७ त्याजशीं वाद करणारा न्यायी ठरला असता;
म्हणजे मी एकदाचा माझ्या न्यायाधीशाच्या
हातून सुटलों असतों.
८ पाहा, मी पुढें गेलों तरी तो सांपडत नाहीं,
मागें गेलों तरी तो तेथें दिसत नाहीं;
९ डाव्या बाजूस, जेथें तो आपली कृति करितो
तिकडे, त्यास मी पाहतों,
तरी तो मला दिसत नाहीं;
तो उजवीकडे वळतो,
तिकडेहि तो मला दिसत नाहीं;
१० परंतु माझा मार्ग त्याला कळला आहे;
त्यानें मला पारखून पाहिलें म्हणजे मी सोन्या-
सारखा निघेन.
११ त्याच्या पावलावर माझें पाऊल पडत आलें आहे;
मी त्याचा मार्ग धरून आहें,
त्यापासून मी भ्रष्ट झालों नाहीं.
१२ त्याच्या तोंडची आज्ञा पाळण्यास मीं माघार
घेतली नाहीं;
माझ्या स्वतःच्या मनोरथापलीकडे मीं त्याच्या
तोंडचीं वचनें जतन करून ठेविलीं आहेत.
१३ तो अनन्यहेतु आहे, त्याला त्यापासून कोण
फिरविणार ?
आपल्या मनास येतें तें तो करितो.
१४ जें मला नेमिलें आहे तें तो घडवून आणीत
आहे;
अशा पुष्कळ गोष्टी त्याजजवळ आहेत;
१५ म्हणून त्याच्यासमोर मी घाबरा होतों;
मी याचा विचार करितों तेव्हां मला त्याची
भीति वाटते.

१६ देवानें माझें मन उदास केलें आहे;
सर्वसमर्थानें मला हैराण केलें आहे.
१७ अंधकारामुळें मला दहशत पडली असें नाहीं;
घोर अंधकारानें माझें मुख झाकिलें म्हणून मला
भय वाटतें असें नाहीं.

२४ १ सर्वसमर्थानें न्यायसमय कां नेमून ठेविले
नाहींत ?
त्याला ओळखणाऱ्यांना त्याच्या दिवसांची कां
प्रतीति येत नाहीं ?
२ कांहीं लोक मेरेच्या खुणा सारितात,
ते बकऱ्यामेंढ्या हरण करून चारितात;
३ ते पोरक्यांचा गाढव हाकून घेऊन जातात;
विधवेचा बैल गहाणादाखल अडकवून ठेवितात;
४ ते कंगालांस मार्गांतून बाजूस करितात;
देशांतील दीनदुबळ्यांस एकत्र लपूनछपून
राहावें लागतें.
५ पाहा, वनांतल्या रानगाढवांप्रमाणें,
ते भक्ष्य मिळविण्याच्या उद्योगास बाहेर पडतात;
त्यांच्या मुलांबाळांसाठीं जंगल त्यांस अन्न पुरवितें.
६ ते शेतांत आपल्या गुरांसाठीं चारा कापितात,
आणि दुर्जनाच्या द्राक्षींच्या मळ्यांतलीं राहिलीं-
साहिलीं द्राक्षें वेचितात.
७ त्यांस वस्त्रावांचून उघडें पडून रात्र काढावी लागते,
थंडींतहि पांघरावयास त्यांला कांहीं नसतें;
८ डोंगरांवरील पर्जन्यवृष्टीनें त्यांस भिजावें लागतें;
त्यांस कसलाहि आश्रय न मिळून खडकासच बिलगून
राहावें लागतें.
९ कांहीं लोक बापपोरक्यास आईच्या स्तनापासून
ओढून काढितात;
कंगालास ते गहाणानें बांधून टाकितात.
१० ते नागवेउघडे चोहोंकडे फिरतात;
ते धान्याच्या पेंढ्या वाहतात तरी उपाशीं मरतात;
११ ते त्यांच्या आवारांत राहून तेल काढितात;
ते द्राक्षाकुंडांत द्राक्ष तुडवितात तरी तान्हेले
राहतात.

१ अथवा : अन्नापेक्षां मी

१२ दाट वस्तीच्या नगरांतून त्यांचा विलाप चालला
असतो;
घायाळ झालेल्यांचा आक्रोश होत असतो;
पण देव ह्या अधर्माकडे लक्ष देत नाहीं.
१३ कित्येक प्रकाशाशीं विरोध करितात;
त्याच्या वाटा ते ओळखीत नाहींत;
ते त्याच्या मार्गांनीं जात नाहींत.
१४ खुनी मनुष्य मोठ्या पहाटेस उठून दीनदुबळ्यांचा
घात करितो;
रात्रीं तो चोर बनतो.
१५ व्यभिचारी मनांत म्हणतो कीं कोणीं मला
पाहूं नये,
म्हणून तो दिवस मावळण्याची वाट पाहत असतो;
तो आपलें तोंड झाकून घेतो.
१६ रात्रीं ते घरें फोडितात,
दिवसा लपून राहतात;
त्यांना उजेडाची ओळखहि नसते.
१७ त्या सर्वांला प्रभातसमय मृत्युच्छायाच भासतो;
त्यांस मृत्युच्छायेच्या भयाचा चांगला अनुभव
असतो.
१८ उदकावरून त्वरित वाहून जाणाऱ्या पदार्थासारखा
तो आहे;
पृथ्वीवरचे रहिवासी त्यांच्या वतनाला शाप देतात;
आपल्या द्राक्षांच्या मळ्यांकडील वाटेनें त्याचें
पुनः येणें होत नाहीं.
१९ अवर्षण व उष्णता हीं बर्फाचें पाणी नाहींसें
करितात;
तसाच अधोलोक पापी जनांला नाहींसा करितो.
२० त्याच्या मातेचें उदर त्याला विसरेल;
कीटक त्याजवर चंगळ करितील;
त्याचें कोणाला स्मरण उरणार नाहीं;
असा दुष्टाचा वृक्षाप्रमाणें निःपात होईल.
२१ अपत्यहीन वंध्येस त्यानें ग्रासिलें;
विधवेचें त्यानें कधीं बरें केलें नाहीं.
२२ तरी बलिष्ठांसहि देव आपल्या सामर्थ्यानें राखितो;
त्यांनीं वांचण्याची आशाहि सोडून दिली असली
तरी ते निभावतात.
२३ तो त्यांस निर्भय राखितो म्हणून ते स्वस्थ असतात;
त्यांच्या व्यवहारावर त्याची कृपादृष्टि असते.
२४ ते उन्नति पावतात; तरी अल्प काळांतच ते
नाहींतसे होतात;
ते अवनत होऊन सर्वांप्रमाणें त्यांची गति होते,
कणसाच्या शेंड्यासारखे ते छाटले जातात.
२५ हें खरें नाहीं असें म्हणून मला कोण लबाड ठरवील?
माझें म्हणणें निरर्थक आहे असें कोण दाखवून
देईल?

२५

१ मग बिल्दद शूही म्हणाला,
२ प्रभुत्व चालविणें व भीति दाखविणें हें
देवाकडेच आहे;
तो ऊर्ध्वलोकीं शांति राखितो.
३ त्याच्या सैन्यांची गणती करितां येईल काय?
त्याचा प्रकाश कोणावर पडत नाहीं?
४ मर्त्य मानव देवापुढें नीतिमान् कसा ठरेल?
स्त्रीपासून जन्मलेला पुरुष निर्मळ कसा ठरेल?
५ पाहा, त्याच्या दृष्टीनें चंद्रहि निस्तेज आहे,
आणि तारेहि निर्मळ नाहींत.
६ तर मर्त्य मानव, जो केवळ कीटक,
मानवपुत्र जो केवळ कृमि, त्याची काय कथा!

२६

१ मग ईयोबानें प्रत्युत्तर केलें,
२ तूं निर्बळांस केवढेंसें साहाय्य केलें?
शक्तिहीन बाहूला तूं कितीसा आधार दिला!
३ बुद्धिहीनास कशी काय मसलत दिली?
तूं कितीसें मोठें ज्ञान प्रगट केलें?
४ तूं कोणापुढें हे शब्द बोललास?
कोणाचें मनोगत तुझ्या तोंडून निघालें?
५ मृतांचीं प्रेतें जलनिधीच्या
व जलचरांच्या खालीं थरथरां कांपत आहेत.
६ त्याच्यापुढें अधोलोक उघडा आहे;

विनाशस्थान आच्छादित नाहीं.
७ त्यानें उत्तरेकडील नभोमंडळ शून्य अवकाशावर
पसरिलें आहे;
त्यानें पृथ्वी निराधार टांगिली आहे.
८ तो पाणी मेघमंडळांत कोंडून ठेवितो;
मेघ त्याच्या भारानें भंग पावत नाहींत.
९ तो आपल्या सिंहासनापुढें आपले मेघ पसरून
तें झाकून टाकितो.
१० प्रकाश व अंधकार यांमधील हद्दीशीं
त्यानें जलनिधीची सीमा भिडविली आहे.
११ त्याच्या धाकानें गगनस्तंभ थरथर कांपतात
व भयचकित होतात.
१२ तो आपल्या सामर्थ्यानें समुद्र शांतवितो;
तो आपल्या बुद्धिबलानें राहाब छिन्नभिन्न करितो;
१३ त्याच्या निःश्वासानें आकाशाची शोभा प्रगट होते;
त्याच्या हातानें धावता राक्षसी सर्प विंधिला आहे;
१४ पाहा; ह्या त्याच्या कार्यक्षेत्राच्या केवळ सीमा
आहेत;
त्याची केवळ चाहूल आपल्या कानीं येते;
पण त्याच्या प्रभावाच्या गर्जनेचा अंत कोणाला
लागेल ?

२७ १ ईयोब आपला प्रबंध पुढें चालवून
म्हणाला,
२ ज्या देवानें मला न्यायास मुकविलें,
ज्या सर्वसमर्थानें माझ्या जिवास क्लेश दिला,
त्याच्या जीविताची शपथ;
३ (अद्यापि माझा श्वासोच्छ्वास बरोबर चालत आहे,
देवानें घातलेला श्वास माझ्या नाकपुड्यांत आहे;)
४ माझें तोंड कुटिल भाषण करीत नाहीं;
माझी जिव्हा कपटाचे बोल बोलत नाहीं.
५ तुमचा वाद खरा आहे असें मी कदापि मान्य
करणार नाहीं;
माझा प्राण जाई तोंवर मी आपलें सत्वसमर्थन
सोडणार नाहीं.
६ मी धार्मिक आहें हें माझें म्हणणें मी धरून
राहणार,
तें मी सोडावयाचा नाहीं;
माझ्या आयुष्यांतील कोणत्याहि दिवसाविषयीं
माझें मन मला खात नाहीं.
७ माझा शत्रु दुष्टांसमान,
माझा विरोधी अधार्मिकासमान ठरो.
८ देव अधार्मिकाचा उच्छेद करून प्राण हरण करील
तेव्हां त्याची काय आशा राहणार ?
९ त्याजवर संकट येईल
तेव्हां त्याची आरोळी देव ऐकेल काय ?
१० तो सर्वसमर्थाच्या ठायीं आनंद पावेल काय ?
तो सर्व प्रसंगीं देवाचा धावा करील काय ?
११ देवाच्या करणीविषयीं मी तुम्हांस बोध करीन;
सर्वसमर्थाचें रहस्य मी छपवून ठेवणार नाहीं.
१२ पाहा, तुम्ही सर्व हें पाहून चुकलां आहां;
तर तुम्ही अशा पोकळ गोष्टी कां बोलून दाखवितां ?
१३ दुष्ट मनुष्यास देवाकडून मिळणारा वांटा हाच,
जुलम्यास सर्वसमर्थाकडून वतन मिळतें तें हेंच;
१४ त्याची संतति वाढली तर ती तरवारीला बळी
पडावयाची;
त्याच्या संतानास पोटभर भाकर मिळणार नाहीं.
१५ त्याच्या मागें राहिलेले मरीच्या तडाक्यानें माती-
आड होतील;
त्याच्या विधवा विलाप करणार नाहींत
१६ त्यानें रुप्याचा संचय धुळीसारखा केला,
वस्त्रें चिखलासारखीं विपुल केलीं;
१७ तरी तो वस्त्रें करील तीं धार्मिक अंगावर घालील.
निर्दोषी त्याचें रुपें वांटून घेईल.
१८ तो आपलें घर कुसेऱ्याच्यासारखें बांधितो;
तें जागल्यानें बांधिलेल्या खोपटीसारखें असतें.

१ मुळात : अबद्दोन
२ अथवा : खवळवितो;

१ अथवा : मी जीवंत आहें तोंपर्यंत माझें मन मला
दोष लावणार नाहीं.

१९ तो संपन्न स्थितींत अंग टाकितो, पण त्याला पुरण्यांत येणार नाहीं.
तो डोळे उघडितो तों तो आटपेल.
२० घोर संकटें पुराप्रमाणें त्याजवर मुदरतात;
रात्रीच्या समयीं तुफान त्याला उडवून नेतें.
२१ पूर्वेचा वारा त्याला उडवून नेतो आणि तो गत होतो.
त्याचा सपाटा त्याला त्याच्या स्थानावरून काढून टाकितो.
२२ कारण देव त्याजवर मारा करील, त्याची गय करणार नाहीं;
तो त्याच्या हातून निसटून जाण्यास पाहील.
२३ लोक टाळ्या पिटून त्याची छीथू करितील,
त्याच्या स्थानांतून त्याला हुसकून लावितील.

२८

१ खरोखर रुप्याची खाण असते;
लोक जें सोनें शुद्ध करतात त्याचेंहि ठिकाण असतें.
२ लोखंड मातींतून काढितात,
पाषाण वितळवून तांबें काढितात.
३ मनुष्य अंधकाराचें निवारण करितो,
अगदीं शेवटापर्यंत जाऊन
निबिड अंधकारांतील व मृत्युच्छायेंतील पाषाणांचा तो शोध करीत असतो.
४ तो लोकवस्तीपासून दूर खाण खणितो;
तेथें जमिनीवर चालणाऱ्यांच्या पांवींहि नसतां त्यांच्यापासून दूर खालीं ते लटकत व लोंबकळत असतात.
५ ही पृथ्वी पाहा; हिच्यापासून भाकर मिळते;
पण खालीं पाहावें तो अग्नीनें जशी काय तिची उलटापालट होते.
६ तींतले पाषाण म्हणजे नीलमण्यांचें घर होत;
तींत सोन्याची मातीहि असते.
७ ती वाट कोणा हिंस्र पक्ष्यास ठाऊक नाहीं;
कोणा घारीचीहि दृष्टि तिजवर गेली नाहीं.
८ तिच्यावर कोणा उन्मत्त पशूनें पाय ठेविला नाहीं;
तिच्यावरून उग्र सिंह कधीं चालला नाहीं.
९ मनुष्य गारेच्या पाषाणाला हात घालितो;
तो पर्वत समूळ उलथून टाकितो.
१० तो खडकांतून भुयारें खोदून काढितो;
सर्व प्रकारच्या मोलवान् वस्तु त्याच्या नजरेस पडतात.
११ झरे बंद करून त्यांचें पाणी तो बाहेर झिरपूं देत नाहीं;
गूढनिधि तो उजेडांत आणितो.
१२ तरी पण ज्ञान कोठून मिळेल ?
बुद्धीचें स्थान कोणतें ?
१३ त्याचें मोल मानवास कळत नाहीं;
तें जिवंतांच्या भूमींत सांपडत नाहीं.
१४ अगाध जलाशय म्हणतो, तें माझ्या ठायीं नाहीं;
समुद्रहि म्हणतो, तें माझ्याजवळ नाहीं.
१५ उत्कृष्ट सुवर्ण देऊन तें मिळत नाहीं;
चांदी तोलून देऊन त्याचें मोल होत नाहीं.
१६ ओफीरचें सोनें, गोमेद व नीलमणि
हीं भारंभार देऊनहि त्याचें मोल होत नाहीं.
१७ सोनें व कांचमणि हीं त्याच्या बरोबरीचीं नाहींत;
उंची सोन्याच्या नगांनीं त्याचा मोबदला होत नाहीं.
१८ प्रवाळ व स्फटिक यांची काय कथा ?
ज्ञानाचें मोल मोत्यांहून अधिक आहे.
१९ कूश देशाचा पुष्पराग त्याच्या तोडीचा नाहीं;
बावनकशी सोनें त्याशीं तुल्य नाहीं.
२० तर मग ज्ञान कोठून येतें ?
बुद्धीचें स्थान कोणतें ?
२१ तें सर्व जीवंतांच्या नेत्रांना अगोचर आहे;
आकाशांतील पक्ष्यांना तें गुप्त आहे.
२२ विनाशस्थान[१] व मृत्यु म्हणतात,
आमच्या कानीं त्याची केवळ वार्ता आली आहे.
२३ देवच त्याचा मार्ग जाणतो;

१ मुळांत: अबद्दोन.

त्याचें स्थान त्यालाच ठाऊक आहे.
२४ कारण त्याची दृष्टि पृथ्वीच्या दिगंतांला पोंचते;
तो आकाशमंडळाखालचें सर्व कांहीं पाहतो.
२५ त्यानें वायूचें वजन ठरविलें
व जल मापून दिलें;
२६ त्यानें पर्जन्यास नियम लावून दिला,
गर्जणाऱ्या विद्युल्लतेस मार्ग नेमून दिला;
२७ तेव्हां त्यानें ज्ञान पाहून त्याचें वर्णन केलें;
त्यानें तें स्थापित केलें व त्याचें रहस्य जाणिलें.
२८ तो मानवास म्हणाला,
पाहा, प्रभूचें भय धरणें हेंच ज्ञान होय;
दुष्टतेपासून दूर राहणें हेंच सुज्ञान होय.

२९

१ ईयोब आपला प्रबंध पुढें चालवून म्हणाला,
२ पूर्वींचे मास मला प्राप्त होते,
पूर्वींच्यासारखे दिवस माझे असते,
तर किती बरें होतें !
त्या दिवसांत देव माझें रक्षण करीत असे,
३ त्याचा दीप माझ्या शिरावर प्रकाशत असे;
व त्याच्या तेजानें मी अंधकारांत चालत असें;
४ त्या काळीं मी भर उमेदींत होतों;
देवाचा समागम मला माझ्या डेऱ्यांत घडे;
५ सर्वसमर्थ त्या काळीं माझ्यासन्निध असे;
माझीं मुलेंबाळें मजसभोंवतीं असत;
६ दह्यालोण्यांत माझीं पावलें भिजत;
खडकांतून तेलाचे प्रवाह मजसाठीं निघत.
७ मी नगराच्या वेशीनजीक जाऊन,
चौकांत माझें आसन मांडीं,
८ तेव्हां तरुण मला पाहून लपत,
वृद्ध उठून उभे राहत;
९ सरदार बोलावयाचे थांबत
व तोंडावर हात ठेवीत;
१० अमीरउमराव स्तब्ध राहत;
त्यांची जीभ त्यांच्या टाळूस चिकटून राही.
११ कोणाच्या कानीं माझें वर्तमान गेलें असतां
तो मला धन्य म्हणे;
कोणाच्या दृष्टीस मी पडलों असतां
तो मजविषयीं ग्वाही देई;
१२ कारण करुणा भाकणारा दीन,
अनाथ व निराश्रित यांचा मी उद्धार करीं.
१३ नाश होण्याच्या लागास आलेल्याचा मी आशीर्वाद घेई;
विधवेचें मन आनंदित होऊन तिला मी गावयाला लावीं.
१४ धर्म माझें पांघरूण होई आणि तो मला आच्छादून टाकी;
माझी नीतिमत्ता हाच माझा झगा व शिरोभूषण होत असे.
१५ मी अंधळ्यास नेत्र होईं;
लंगड्यास पाय होईं.
१६ मी लाचारांचा पिता असें;
अपरिचिताच्या फिर्यादीची मी दाद घेईं.
१७ मी दुष्टाचे दांत पाडीं,
त्याच्या दांतांतून शिकार सोडवीं.
१८ तेव्हां मी म्हणें कीं माझ्या घरकुंड्यांतच राहून मला मरण येईल,
व माझे दिवस वाळूच्या कणांप्रमाणें[1] बहुगुणित होतील;
१९ माझें मूळ पाण्याजवळ पसरेल;
माझ्या फांदीवर रात्रभर दहिंवर राहील.
२० माझें वैभव जशाचें तसेंच टवटवीत राहील;
माझें धनुष्य माझ्या हातीं सर्वदा नवेंच राहील.
२१ लोक माझें भाषण कान देऊन ऐकत राहत,
माझा निर्णय ऐकण्यास ते स्तब्ध राहत.
२२ माझें बोलणें संपल्यावर ते पुनः बोलत नसत;
माझें भाषण त्यांला पर्जन्यवृष्टीसारखें होई.
२३ लोक माझ्या बोलण्याची पावसाप्रमाणें वाट पाहत;
जसें काय अखेरच्या पावसासाठीं तोंड पसरून ते

१ अथवा : फिनिक्स पक्ष्याप्रमाणें

अपेक्षा करीत.
२४ ते निराश झाले असतां मी त्यांजकडे हास्यवदन
करून पाहीं;
त्यांच्यानें माझी मुद्रा उतरवत नसे.
२५ मी त्यांचा मार्गदर्शक होई व त्यांच्यामध्यें
अग्रस्थानीं बसें;
सैन्यांत जसा राजा, शोकग्रस्तांत जसा समा-
धान करणारा,
तसा मी त्यांच्यामध्यें असें.

३० १ असें असूनहि आतां जे मजहून अल्पवयाचे
आहेत,
त्यांच्या वडिलांची लायकी माझ्या मेंढ्या-
बकऱ्या राखावयास कुत्रे म्हणून ठेवण्याचीहि मी
समजत नसें,
ते माझी टवाळी करितात
२ ज्यांचें वीर्य नष्ट झालें आहे,
त्यांच्या बाहुबलाचा मला काय उपयोग?
३ ते दुर्भिक्षानें व उपासमारानें दुबळे झाले आहेत;
मयाण व वैराण प्रदेशांत मिळेल तें चावून ते
गुजारा करीत आहेत.
४ ते झाडीच्या आसपासची लोण खुडून घेतात;
रतम झाडाच्या मुळांवर ते निर्वाह करीत आहेत.
५ लोकांमधून त्यांला घालवून देतात;
जशी चोराच्यामागून तशी त्यांच्यामागून लोक
ओरड करितात.
६ उदासवाण्या खोऱ्यांत,
जमिनीच्या विवरांत व कपारींत त्यांस राहावें लागतें.
७ झाडीमध्यें ते रेंरें करीत बसतात;
खाजकुयलीच्या खालीं ते पडून राहतात.
८ ते मूढांचे किंबहुना अधमांचे वंशज आहेत;
त्यांला देशांतून हाकून दिलें आहे.
९ हे लोक माझ्या निंदेचे पोवाडे गातात;
माझें नांव ज्याच्यात्याच्या तोंडीं झालें आहे.
१० ते मला अमंगळ मानितात,
माझ्या वाऱ्यासहि उभे राहत नाहींत,
माझ्या तोंडावर थुंकावयास चुकत नाहींत;
११ कारण देवानें माझ्या आयुष्याची दोरी ढिली
करून मला दुःख दिलें आहे;
म्हणून ते मजसमोर आपल्या तोंडाचा लगाम
झुगारून देतात.
१२ बाजारबुणगे मजवर उजवीकडून गर्दी करितात,
माझे पाय ढकलून देतात,
ते माझ्या नाशाचे मोरचे रचितात.
१३ ते माझ्या मार्गाची नासाडी करितात,
ज्यांला कोणी साहाय्य नाहीं
ते देखील माझ्या नाशास साहाय्य होतात.
१४ खिंडारांतून शिरकाव करणाऱ्यांप्रमाणें ते चालून
येतात.
कोसळून पडलेल्या ढिगारांतून ते मजवर लोटतात.
१५ मजवर घोर प्रसंग ओढवले आहेत;
माझी प्रतिष्ठा ते वायूप्रमाणें उडवून देत आहेत;
माझें सौख्य अभ्राप्रमाणें विरलें आहे.
१६ माझ्या जिवाचें आतां पाणी पाणी झालें आहे;
दुःखाच्या दिवसांनीं मला पछाडिलें आहे.
१७ रात्रीच्या समयीं माझीं हाडें पिंचून गळतात;
मला कुरतुडणाऱ्या वेदना थांबत नाहींत.
१८ व्याधीच्या मोठ्या वेगामुळें माझा झगा विस्कळित
झाला आहे;
पेहरणाच्या गळ्याप्रमाणें तो अंगाला जखडून बसतो.
१९ त्यानें मला चिखलांत लोटून दिलें आहे;
धूळ व राख यांच्यासारखा मी झालों आहें.
२० मी तुझा धावा करितों, पण तूं ऐकत नाहींस;
मी उभा राहतों; पण तूं मजवर डोळे वटारितोस.
२१ तूं मजशीं निष्ठुर बनला आहेस;
तूं आपल्या बाहुबलानें माझा छळ करीत आहेस.
२२ तूं मला वायूवर आरूढ करून उडवीत आहेस;
आणि गर्जणाऱ्या तुफानांत मला विरवीत आहेस.
२३ मला ठाऊक आहे कीं तूं मला मृत्युवश करिशील;
सर्व जीवधारी ज्या धामीं एकवट व्हावयाचे

त्याप्रत मला पोंचविशील.
२४ तरी कोणी कोसळत असतां आपला हात पुढें करीत नाहीं काय ?
आपला नाश होऊं लागला असतां तो धावा करीत नाहीं काय ?
२५ कठीण दिवस कंठणाऱ्याला पाहून मी हळहळलों नाहीं काय ?
लाचारांसाठीं मी कष्टी झालों नाहीं काय ?
२६ मी सौख्याची अपेक्षा करीत होतों तों विपत्ति आली;
मी प्रकाशाची अपेक्षा करीत होतों तों अंधकार आला.
२७ माझें अंतर्याम एकसारखें पोळत आहे;
दुःखाचे दिवस मला प्राप्त झाले आहेत.
२८ मी काळा होऊन फिरत आहें, तरी सूर्याच्या किरणांनीं नव्हे;
मी जनसमाजांत उभा राहून करुणा भाकीत आहें.
२९ मी कोल्ह्यांचा बंधु,
शहामृगांचा सोबती झालों आहें.
३० माझी त्वचा काळी होऊन गळून पडत आहे;
माझीं हाडें तापानें दग्ध होत आहेत.
३१ माझ्या वीणेंतून शोकसूर,
माझ्या पाव्यांतून विलापरव निघत आहेत.

## ३१

१ मीं तर आपल्या डोळ्यांशीं करार केला आहे;
मीं कोणा कुमारीवर नजर कशी जाऊं देऊं ?
२ वरून देवाकडून काय वांट्यास येणार ?
ऊर्ध्वलोकाहून कोणतें वतन सर्वसमर्थ भोगावयास लावणार ?
३ दुष्टास विपत्ति व दुष्कर्म्यास अनर्थ[१]
प्राप्त होत नाहीं काय ?
४ माझे सर्व मार्ग तो पाहत नाहीं काय ?
माझीं सर्व पावलें तो गणीत नाहीं काय ?
५ मीं असत्याची सोबत केली असली,
माझ्या पायांनीं कपटाकडे धाव घेतली असली
६ तर त्यानें मला न्यायाच्या ताजव्यांत तोलावें;
देवाला माझी सात्त्विकता कळून येऊं द्या.
७ माझें पाऊल आडमार्गावर पडलें असलें,
माझ्या मनानें माझ्या डोळ्यांमागून धाव घेतली असली,
माझ्या हातांस कांहीं डाग लागला असला,
८ तर मीं पेरिलें तें दुसरा खावो;
लोक माझ्या शेतांतलें पीक उपटून टाकोत,
९ माझें मन कोणा स्त्रीला पाहून लंपट झालें असलें,
मी आपल्या शेजाऱ्याच्या दाराशीं टपून बसलों असलों,
१० तर माझी स्त्री दुसऱ्याचें दळणकांडण करो;
परके तिला ओणवी करोत.
११ कारण हें दुष्कर्म आहे;
हा न्यायाधीशांनीं शिक्षा करण्याजोगा गुन्हा आहे.
१२ कारण हा कामाग्नि भस्म करून नाशाप्रत नेतो;
त्याच्या पायीं माझी सर्व मालमत्ता समूळ नष्ट झाली असती.
१३ माझा दास व दासी मजशीं वाद करीत असतां
मीं त्यांचा हक्क तुच्छ लेखिला असता,
१४ तर देव माझा न्याय करावयास उठल्यास मीं काय केलें असतें ?
त्यानें झाडा घेतला असता तर मीं काय जाब दिला असता ?
१५ ज्यानें मला गर्भाशयांत निर्माण केलें त्यानें त्यालाहि नाहीं का केलें ?
आम्हां दोघांसहि गर्भाशयांत एकानेंच नाहीं का घडिलें
१६ मीं कंगालांचा आशाभंग केला असला,
विधवेचे डोळे शिणविले असले,
१७ मीं आपला भाकरतुकडा एकट्यानेंच खाल्ला असला,
त्यांतला कांहीं पोरक्यास दिला नसला,
१८ (माझ्या बाळपणापासून बापाकडे जसा मुलगा

१ मुळांत : उकळत

तसा तो मजजवळ लहानाचा मोठा झाला आहे,
ल्हानपणापासून मी विधवेचा संभाळ करीत
आलों आहें, )
१९ अथवा कोणी वस्त्रावांचून मरत आहे,
कोणा दरिद्र्यास पांघरूण नाहीं हें पाहून,
२० त्यांस मीं आपल्या मेंढरांच्या लोकरीचीं वस्त्रें
दिलीं नसलीं,
त्याच्या अवयवांस ऊब येईलसें करून त्यांचा
आशीर्वाद घेतला नसला,
२१ वेशीवर कोणी आपल्या पक्षाचा आहे हें पाहून
मीं पोरक्यावर आपला हात उचलिला असला;
२२ तर माझीं खवाटें पाठींतून निखळून पडोत,
माझे हात खांद्यांच्या सांध्यांतून मोडून पडोत.
२३ देवापासून येणाऱ्या विपत्तीचा मला धाक असे;
त्याच्या प्रभावापुढें माझें कांहीं चालत नसे.
२४ जर मीं सुवर्णावर भरंवसा ठेविला असता,
तुजवर माझी भिस्त आहे असें सुवर्णास म्हटलें
असतें,
२५ जर माझें धन बहुत आहे,
माझ्या हातांनीं फार कमाई केली आहे, याचा
मीं आनंद केला असता,
२६ जर सूर्यास प्रकाशतां पाहून.
चंद्रास थाटानें भ्रमण करितां पाहून,
२७ माझें मन गुप्तपणें मोहित झालें असतें,
आणि आपल्या हाताचें चुंबन घेऊन मीं त्यांस
नमन केलें असतें;
२८ तर हाहि न्यायाधीशांपुढें नेण्याजोगा गुन्हा
झाला असता;
अज्ञानें ऊर्ध्वलोकींच्या देवाशीं मीं दगा केला
असें झालें असतें.
२९ माझ्या द्वेष्ट्याचा नाश झालेला पाहून मला आनंद
वाटला असता,
त्याजवर अरिष्ट आलें हें पाहून मला उल्लास
वाटला असता,
३० (त्याचा प्राणनाश व्हावा असा शाप मागून
मीं आपल्या जिव्हेस पाप करूं दिलें नाहीं,)
३१ याच्या घरीं मांसान्नानें तृप्ति झाली नाहीं असा
एक तरी आढळेल,
असें माझ्या डेऱ्यांतल्या लोकांनीं म्हटलें नसेल,
३२ (कोणा परदेशस्थास माझ्या दाराबाहेर बिऱ्हाड
करून राहण्याची पाळी आली नाहीं,
वाटसरास माझें दार खुलें असे, )
३३–३४ जनसमूहाला भिऊन,
कुलीन घराणीं मला नांवें ठेवितील याचा
धाक वाटून
मी गपचूप राहिलों व घराबाहेर पडलों नाहीं,
मनुष्यांसारखें मीं आपल्या अपराधावर झाकण
घातलें असतें,
माझें पाप मनांतल्या मनांत लपविलें असतें तर
३५ माझें कोणी ऐकणारा असता तर किती बरें होतें!
हेंच माझें दस्तखत, सर्वसमर्थानें मला जाब द्यावा;
माझ्या प्रतिवाद्याचा लेखी आरोप दाखल झाला
असता तर बरें झालें असतें.
३६ तो मीं आपल्या खांद्यावर वागविला असता;
शिरोभूषणाप्रमाणें तो डोक्याला वेष्टिला असता.
३७ मीं पावलापावलाचा हिशोब त्याला दिला असता;
त्याजपाशीं मी सरदारासारखा गेलों असतों.
३८ माझ्या शेतानें मजविरुद्ध गाऱ्हाणें केलें असेल,
त्याच्या सर्व तासांनीं मिळून आक्रोश केला असेल,
३९ मोबदला दिल्यावांचून त्यांतलें पीक मीं खाल्लें असेल,
त्याच्या मालकाच्या प्राणोत्क्रमणास कारण झालों
असेन,
४० तर त्यांत गव्हांच्या ऐवजीं कांटेधोतरे,
जवांच्या ऐवजीं कुसळें उगवोत.

येथें ईयोबाचें भाषण समाप्त झालें.

३२ १ ईयोब स्वतांच्या दृष्टीनें निर्दोष आहे
हें पाहून त्या तिघां पुरुषांनीं त्यास उत्तर
देण्याचें सोडून दिलें. २ मग राम घराण्यांतील

बरखेल बूजी याचा पुत्र अलीहू याचा राग भडकला;
ईयोबानें देवाला निर्दोषी ठरविण्याचें सोडून स्वतांस
निर्दोषी ठरवावयास पाहिलें, म्हणून त्याजवर त्याचा
राग भडकला. ३ आपल्या तिघां मित्रांस ईयोबाला
उत्तर द्यावयास सांपडलें नसतांहि त्यांनीं त्यास दोषी
ठरविलें म्हणून त्यांजवरहि त्याचा राग भडकला. ४ ते
वयानें मोठे होते म्हणून अलीहू ईयोबाशीं भाषण
करावयास मिळेपर्यंत थांबला होता. ५ त्या तिघां
पुरुषांच्या तोंडून कांहीं प्रत्युत्तर निघेना हें पाहून
त्याचा राग भडकला.

६ मग बरखेल बूजी याचा पुत्र अलीहू यानें उत्तर
दिलें; तो म्हणाला,
मी अल्पवयी आहें व तुम्ही वयोवृद्ध आहां;
म्हणून मीं मुरवत धरिली; आपलें मत तुमच्या-
पुढें प्रगट करण्यास मी कचरलों.
७ मला वाटलें, पुष्कळ दिवस पाहिलेल्यांनीं
भाषण करावें,
बहुत वर्षें घालविलेल्यांनीं अक्कल सांगावी;
८ पण मानवाच्या ठायीं आत्मा असतो;
सर्वसमर्थाचा श्वास त्यास बुद्धि देतो.
९ मनुष्य वयानें मोठे असले तरच ते ज्ञानी असतात,
वयोवृद्ध असले तरच त्यांस खरेंखोटें समजतें,
असें नाहीं.
१० ह्याकरितां मी म्हणतों कीं माझें ऐका;
मीहि आपलें मत कळवितों.
११ तुम्ही कांहीं समर्पक उत्तरें शोधून काढाल
या आशेनें मी तुमचें भाषण ऐकत राहिलों,
तुमचे मुद्दे मीं लक्षपूर्वक श्रवण केले.
१२ मीं तुमचें बोलणें मन लावून ऐकलें;
तों पाहा, तुम्हांतल्या कोणींहि ईयोबाच्या पक्षाचें
खंडन केलें नाहीं.
कोणीं त्याला समर्पक उत्तर दिलें नाहीं.
१३ देवच त्याचें खंडन करील, मनुष्याच्यानें
होणार नाहीं,
इतकें ज्ञान त्याच्या ठायीं आम्हांस आढळून आलें
आहे असें म्हणूं नका;
१४ कारण त्यानें मजवर वादाचा मोर्चा फिरविला
नाहीं;
तुमचे शब्द घेऊन मी त्यांस उत्तर देणार नाहीं.
१५ ते थक्क झाले आहेत, कांहीं उत्तर देत नाहींत;
शब्द त्यांना सोडून गेले आहेत.
१६ ते बोलत नाहींत, निरुत्तर होऊन उभे आहेत,
म्हणून मीं थांबावें काय ?
१७ मीहि माझ्या तर्फेचें बोलतों,
माझें मत प्रगट करितों.
१८ माझ्या मनांत शब्दांची गर्दी झाली आहे;
माझा अंतरात्मा मला स्फूर्ति देत आहे.
१९ पाहा, माझें अंतर्याम बंद करून ठेविलेल्या द्राक्षा-
रसाप्रमाणें झालें आहे;
नव्या द्राक्षारसाच्या बुधल्यांप्रमाणें तें फुटावयास
आलें आहे.
२० मी बोललों तरच मला चैन पडेल;
मी आपलें तोंड उघडीन, उत्तर देईन.
२१ मी कोणाचा पक्ष धरणार नाहीं,
कोणाची खुशामत करणार नाहीं.
२२ खुशामत करण्याचें मला ठाऊक नाहीं,
असेल तर माझा उत्पन्नकर्ता मला तत्काळ घेऊन
जाईल.

३३

१ तर आतां हे ईयोबा, माझें भाषण
श्रवण कर,
माझें सगळें बोलणें ऐकून घे.
२ पाहा, आतां मीं आपलें तोंड उघडिलें आहे;
माझी जीभ माझ्या तोंडांत हालूं लागली आहे.
३ माझ्या मनांतले विचार जशाचे तसे माझ्या
शब्दांनीं प्रगट होणार;
माझ्या वाचेनें प्रगट होणारें ज्ञान माझ्या तोंडून
निष्कपटपणें निघणार.
४ देवाच्या आत्म्यानें मला निर्माण केलें आहे;
सर्वसमर्थाच्या श्वासानें मला जीवन प्राप्त झालें आहे.
५ तुला उत्तर देतां येईल तर दे;

सिद्ध हो, मजपुढें उभा राहा.
६ पाहा, देवापुढें मी तुजसारखाच आहें;
मीहि मातीच्या गोळ्याचा घडलेला आहें.
७ माझ्या धाकानें तुला घाबरावयाला नको;
माझा दाब तुला भारी होणार नाहीं.
८ तुझें बोलणें माझ्या कानीं पडलें,
तुझे शब्द मीं ऐकले, ते हे :
९ मी शुद्ध आहें, मी निरपराध आहें;
मी निष्कलंक आहें, मी निर्दोष आहें;
१० पाहा, देव कसा मजविरुद्ध निमित्त शोधितो;
तो मला शत्रु गणितो,
११ तो माझे पाय खोड्यांत घालितो;
तो माझ्या सगळ्या चालचलणुकीवर नजर ठेवितो.
१२ पाहा, मी तुला याचें उत्तर देतों; हें तुझें बोलणें यथार्थ नाहीं;
कारण देव मानवाहून थोर आहे.
१३ तो आपल्या कोणत्याहि करणीचें कारण सांगत नाहीं,
म्हणून का तूं त्याजशीं वाद घालितोस ?
१४ देव एका प्रकारें नव्हे तर दोन प्रकारें मनुष्याशीं बोलतो;
पण तो त्याकडे चित्त देत नाहीं.
१५ स्वप्नस्थितींत, रात्रीच्या दृष्टांतांत,
मनुष्य गाढ निद्रेंत असतां,
तो बिछान्यावर पडून झोप घेत असतां,
१६ देव त्याचे कान उघडितो;
त्यास प्राप्त झालेल्या बोधावर तो मुद्रा करितो.
१७ तेणेंकरून तो मनुष्याच्या कृतीला आळा घालितो,
पुरुषाच्या गर्वाचा परिहार करितो.
१८ तो त्याचा जीव गर्तेपासून रक्षितो,
शस्त्रानें होणाऱ्या नाशापासून त्याचा जीव बचावितो.
१९ कोणाला अशी शिक्षा होते कीं तो क्लेश भोगीत बिछान्यावर लोळत राहतो;
त्याच्या हाडांची एकसारखी तडफड चालते;
२० त्याचा जीव अन्नास कंटाळतो,
त्याच्या मनाला मिष्टान्नाचा तिटकारा येतो.
२१ त्याचा देह गळून तो दिसतो न दिसतोसा होतो;
त्याचीं हाडें पूर्वी दिसत नसत, तीं बाहेर येतात.
२२ शेवटीं तो गर्तेजवळ जाऊन ठेपतो,
त्याचें जीवन नाश करणाऱ्यांच्या तावडींत जातें.
२३ मनुष्याला सन्मार्ग दाखविणारा हजारांत एक
असा कोणी मध्यस्थ दिव्यदूत त्यास आढळला,
२४ तर देव त्याजवर प्रसन्न होऊन म्हणेल,
याचा बचाव कर, याला गर्तेत पडूं देऊं नको;
मला खंड मिळाला आहे.
२५ मग त्याचें शरीर बालकाच्यापेक्षां टवटवीत होतें;
त्याचे तारुण्याचे दिवस त्याला पुनः प्राप्त होतात.
२६ तो देवाची प्रार्थना करितो, आणि तो त्याजवर प्रसन्न होतो;
तो आनंदानें त्याचें दर्शन घेतो;
देव त्याची निर्दोषता पूर्ववत् स्थापीत करितो.
२७ तो गाणीं गाऊन लोकांस म्हणतो,
मीं पाप केलें होतें; मी सरळ मार्ग सोडून वाकड्या मार्गानें चाललों होतों,
त्याचें प्रायश्चित्त मला मिळालें नाहीं;
२८ त्यानें माझा जीव रक्षिला, मला गर्तेत पडूं दिलें नाहीं,
माझ्या जिवाला प्रकाश लाभला आहे.
२९ पाहा, हें सर्व देव मनुष्याला दोनतीनदा करितो;
३० असा तो त्याचा जीव गर्तेपासून बचावितो,
म्हणजे तो जीवनप्रकाशानें प्रकाशित होतो.
३१ हे ईयोबा, कान देऊन माझें ऐक;
उगा राहा, मला बोलूं दे.
३२ तुला कांहीं उत्तर द्यावयाचें असेल तर तें दे;
बोल, कारण तुला निर्दोष ठरवावयाची माझी इच्छा आहे.
३३ नाहीं तर माझें ऐक;
उगा राहा, मी तुला ज्ञान सांगतों.

३४

१ अलीहू आणखी म्हणाला,
२ समजदार लोकहो, तुम्ही माझें बोलणें ऐका;
अहो, जाणते लोकहो, कान द्या.
३ अन्नाची परीक्षा जशी जिभेला होते,
तशी शब्दांची परीक्षा कानाला होते.
४ आतां न्याय्य असेल तें आपण निवडून घेऊं;
चांगलें काय याचा आपण आपसांत निवाडा करूं.
५ आतां ईयोब म्हणतो कीं मी निर्दोष आहें;
देवानें माझा अन्याय केला आहे;
६ माझा पक्ष खरा असतां मी खोटा ठरलों आहें;
मी निरपराध असतां माझा घाय असाध्य आहे.
७ ईश्वरनिंदा उदकाप्रमाणें प्राशन करणारा
ईयोबासारखा मनुष्य कोण आहे ?
८ तो अधर्म करणाऱ्यांबरोबर संगति करितो,
दुर्जनांची सोबत धरितो.
९ तो म्हणतो देवाशीं सख्य ठेवून
मनुष्याला काय लाभ होतो ?
१० ह्याकरितां समंजस जनहो, माझें ऐकून घ्या;
देवाकडून दुष्कर्म व्हावें, सर्वसमर्थाकडून अन्याय व्हावा,
ही कल्पनाहि करावयाला नको.
११ तो मनुष्याला त्याच्या कर्माचें प्रतिफळ देतो,
प्रत्येकास त्याच्या त्याच्या आचाराप्रमाणें गति देतो.
१२ देव निःसंशय कांहीं वाईट करीत नाहीं,
सर्वसमर्थ प्रभु विपरीत न्याय करीत नाहीं.
१३ ही पृथ्वी त्याच्या स्वाधीन कोणीं केली आहे ?
ह्या सर्व जगाची व्यवस्था कोणीं लाविली ?
१४ त्याचें चित्त स्वतांकडेसच असलें,
त्यानें आपला आत्मा व श्वास आवरून स्वतांच्यां ठायीं परत घेतला,
१५ तर सर्व जीवधाऱ्यांचा एकदम प्राणांत होईल;
मानव पुन्हा मातीस मिळेल.
१६ आतां समजून घे, हें ऐक;
माझ्या तोंडून शब्द निघतील त्यांकडे कान दे.
१७ जो न्यायाचा वैरी तो शास्ता होईल काय ?
जो न्यायी, जो समर्थ, त्याला तूं दोषी ठरविशील काय ?
१८ तूं अधम आहेस, असें राजाला म्हणणें,
तुम्ही दुष्ट आहां असें अमिरांस म्हणणें उचित होईल काय ?
१९ जो अमिरांची भीड राखीत नाहीं,
जो श्रीमंताला गरिबांहून अधिक मानीत नाहीं,
( कारण ते सर्व त्याच्या हातानें निर्माण झाले आहेत, )
त्याला दोषी ठरविणें उचित होईल काय ?
२० लोक क्षणांत मृत्यु पावतात,
ऐन मध्यरात्रीं झटके खाऊन गत होतात;
बलिष्ठ जन कोणाचा हात न लागतां उच्छेद पावतात.
२१ कारण देवाची दृष्टि प्रत्येकाच्या आचरणावर असते;
त्याचें प्रत्येक पाऊल तो पाहतो.
२२ अधर्मी ज्यांत लपून राहतील असा काळोख,
असा घोर अंधकार नाहीं.
२३ मनुष्यानें देवाच्या न्यायासनापुढें जावें म्हणून त्याला त्याजकडे आणखी लक्ष पुरविण्याचें प्रयोजन नसतें.
२४ तो बलिष्ठांचा चुराडा करितो
आणि त्यांच्या स्थानीं दुसऱ्यांस स्थापितो;
त्याला त्यांची चौकशी करावी लागत नाहीं.
२५ ह्याप्रमाणें तो त्यांचीं कृत्यें जाणितो;
तो त्यांस रात्रीं असा उलथून टाकितो कीं त्यांचा चुराडा होतो.
२६ ते दुष्ट आहेत म्हणून
त्यांस तो लोकांसमक्ष ताडण करितो;
२७ कारण त्याला अनुसरण्याचें सोडून
त्याचा कोणताहि मार्ग त्यांनीं ध्यानांत आणिला नाहीं.
२८ त्यांच्या करणीमुळें कंगालांचा आक्रोश त्याच्यापर्यंत गेला;

दीनांची आरोळी त्याच्या कानीं गेली.
२९ त्यानें कोणास शांतिसमाधान दिलें तर त्याला
कोण दोष देईल ?
त्यानें तोंड फिरविलें तर त्याचें दर्शन कोणाला
होईल ?
हें राष्ट्रासंबंधानें असो कीं एका व्यक्तीसंबंधानें
असो, सारखेंच;
३० हें अशासाठीं कीं अधर्म्याचें राज्य होऊं नये,
व लोकांस कोणीं मोहपाशांत घालूं नये.
३१ देवाला कोणी कधीं म्हटलें काय कीं
मीं निरपराध असून शिक्षा भोगिली;
३२ जो माझा अपराध मला दिसत नाहीं तो मला
दाखीव;
मीं जर वाईट केलें असेल तर यापुढें मी तसें
करणार नाहीं ?
३३ देवाकडून मिळणारें प्रतिफळ तुला तुच्छ वाटतें,
तर तें काय तुझ्या मनाप्रमाणें असावें ?
तूं पाहिजे तर आवडनिवड कर, मी नाहीं;
तुला काय वाटतें तें सांग.
३४ सर्व समंजस लोक,
माझें भाषण ऐकणारे सर्व शहाणे पुरुष असें
म्हणतील कीं
३५ ईयोब अज्ञानानें बोलत आहे;
त्याचें बोलणें समंजसपणाचें नाहीं.
३६ शेवटपर्यंत ईयोबाची कसोटी पाहावी हें बरें;
कारण दुष्टप्रमाणें त्यानें उत्तरें दिलीं आहेत.
३७ आपल्या पापांत आणखी अमर्यादेची भर त्यानें
घातली आहे;
आमच्यादेखत तो टाळी वाजवितो
आणि देवाविरुद्ध बेसुमार बोलतो.

३५ १ अलीहू आणखी म्हणाला,
२ देवावरील माझी फिर्याद न्यायाची आहे
असें तूं म्हणतोस काय ?
हें तुला म्हणण्याचा हक्क आहे असें तुला वाटतें काय ?
३ यास्तव तूं म्हणतोस कीं तुला काय लाभ होणार ?
मीं पाप केलें असतें तर माझें काय कमी झालें
असतें ?
४ मी तुला व तुझ्याबरोबर तुझ्या मित्रांसहि उत्तर
देतों :
५ आकाशाकडे दृष्टि देऊन पाहा;
हें नभोमंडळ पाहा, हें तुजहून उंच आहे.
६ तूं पाप केलें तर देवाचें काय जातें ?
तुझे अपराध बहुत असले तर त्याचें काय
बिघडणार ?
७ तूं धार्मिक असलास तर तूं त्याला काय देणार ?
तुजपासून त्याला काय मिळणार ?
८ तुझ्या अधर्माचें फळ तुजसारख्या मानवालाच
बाधेल;
तुझ्या धर्माचें फळ मानवसंततीलाच लाभेल.
९ अतिशयित जुलूम झाला म्हणजे लोक आक्रोश
करितात;
जबरदस्त लोकांचा हात त्यांजवर पडला म्हणजे
ते साहाय्यासाठीं आरोळी मारितात.
१० तरी पण असें कोणीहि म्हणत नाहीं कीं जो
रात्रीचीं स्तोत्रें गावयाला देतो,
तो माझा निर्माणकर्ता कोठें आहे ?
११ जो आम्हांस पृथ्वीवरील पशूंहून अधिक
शिकवितो,
आणि आकाशांतील पक्ष्यांहून अधिक ज्ञान देतो,
तो कोठें आहे ?
१२ दुर्जनांच्या उन्मत्तपणामुळें
ते असा आक्रोश करितात पण कोणी ऐकत नाहीं,
१३ देव निरर्थक ओरड खरोखर ऐकत नाहीं;
सर्वसमर्थ तिजकडे लक्ष देत नाहीं.
१४ तूं म्हणतोस कीं त्याचें दर्शन मला घडत नाहीं;
पण हा तुझा वाद त्याच्यासमोरच आहे,
तर तूं त्याची वाट पाहत राहा;
१५ पण आतां त्यानें कोपून दंड केला नाहीं,

१ अथवा : मला

त्यानें अपराधाकडे फारसें लक्ष पुरविलें नाहीं;
१६ म्हणून ईयोब आपलें तोंड उघडून निरर्थक भाषण करितो,
आणि अज्ञानानें वाद माजवितो.

३६
१ अलीहू आपलें भाषण पुढें चालवून म्हणाला,
२ अमळ थांब; देवाच्या वतीनें आणखी कांहीं बोलण्याजोगें आहे.
असें मी तुला दाखवितों.
३ मी दुरून आपलें ज्ञान आणून
आपल्या उत्पन्नकर्त्याचें न्याय्यत्व स्थापित करीन.
४ माझे शब्द वास्तविक खोटे नाहींत;
हा पूर्ण ज्ञानी पुरुष तुजपुढें उभा आहे.
५ पाहा, देव समर्थ आहे तरी तो कोणास तुच्छ मानीत नाहीं;
त्याचें ज्ञानबल प्रचंड आहे.
६ तो अधर्म्यास वांचवीत नाहीं;
तो दीनांचा न्याय करितो.
७ तो धार्मिकांवरील आपली दृष्टि काढीत नाहीं,
तर त्यांस राजांबरोबर सिंहासनावर अक्षय स्थापितो,
व त्यांची उन्नति होते.
८ त्यांना बेड्यांनीं जखडिलें,
दुःखरूप रज्जूंनीं त्यांस बांधून ठेविलें,
९ तर त्यांची कृति व त्यांचे अपराध यांची त्यांस जाणीव करून देतो,
त्यांनीं उन्मत्तपणाचें वर्तन केलें असें त्यांस दाखवून देतो.
१० त्यांचे कान उघडून ते बोध घेतील असें तो करितो
आणि त्यांस अधर्म सोडावयास सांगतो.
११ हें ऐकून ते अंकित झाले तर
ते आपले दिवस सुस्थितींत घालवितील,
आपलीं वर्षें सुखानें काढितील;
१२ पण त्यांनीं ऐकलें नाहीं तर ते शस्त्रानें ठार होतील;
ज्ञानप्राप्तीवांचून त्यांचा प्राणांत होईल.
१३ जे मनानें अधर्मी असतात ते हृदयांत क्रोध बाळगितात;
त्यानें त्यांस बांधिलें असतां ते धावा करीत नाहींत.
१४ ते भरज्वानींत मरतात;
त्यांचा प्राण अमंगळ पुरुषांप्रमाणें नाश पावतो;
१५ तो दुःखितांस त्यांच्या दुःखाच्या द्वारें सोडवितो;
विपत्तीच्या द्वारें त्यांची कानउघाडणी करितो.
१६ तो तुलाहि दुःखाच्या जबड्यांतून सोडवून
संकोच नाहीं अशा प्रशस्त स्थलीं नेतो;
तुझ्या मेजावर मिष्टान्नाची रेलचेल होईल.
१७ तूं दुष्टासारखा दोषारोप करीत राहशील;
तर दोषारोप व न्यायदंड यांच्या तावडींत तूं सांपडशील.
१८ आपल्या क्रोधानें मोहांत पडून तूं अपमान करण्यास प्रवृत्त होऊं नको;
हा खंड भारी आहे म्हणून बहकूं नको.
१९ तुझ्या अपार संपत्तीचा
तुझ्या संपत्तीच्या साऱ्या बळाचा कांहीं उपयोग होईल काय?
२० लोक जागच्या जागीं नष्ट होतील
अशा रात्रीची उत्कंठा धरूं नको.
२१ संभाळ, दुष्टतेकडे वळूं नको;
ती तुला दुःखापेक्षां पसंत वाटत आहे.
२२ पाहा, देव आपल्या सामर्थ्यानें थोर कृत्यें करितो;
त्याच्यासमान शिक्षण देणारा कोण आहे?
२३ त्याला मार्ग लावून देणारा कोण आहे?
तूं अधर्म केला आहे असें त्याला कोण म्हणणार
२४ लोकांनीं गायनरूपें त्याच्या करणीचा महिमा वर्णिला आहे, तो गाण्याचें स्मरण ठेव.
२५ सर्व मनुष्यें ती पाहत राहतात;
मानव ती दुरून पाहतो.
२६ पाहा, देव थोर आहे, तो आम्हांस अगम्य आहे
त्याच्या वर्षांची संख्या अगण्य आहे.
२७ तो जलबिंदु आकर्षितो;

त्यांची वाफ होऊन ते पर्जन्यरूपानें पडतात;
२८ मेघ त्यांची वृष्टि करितात;
ते लोकसमूहावर विपुल वर्षाव करितात.
२९ मेघांचा पसारा, मेघमंडपांतील गडगडाट
यांचें ज्ञान कोणाला होईल ?
३० पाहा, तो आपणाभोवतीं प्रकाश पसरितो;
त्यानें समुद्रतल व्यापितो.
३१ यांच्या योगानें तो राष्ट्रांचा न्याय करितो,
अन्नाची विपुलता करितो.
३२ तो विद्युल्लता आपल्या हातीं धरून
तिनें अचूक आघात करावा अशी तिला आज्ञा करितो.
३३ मेघगर्जना त्याच्या येण्याची खबर देते;
गुरेंढोरेंहि तो येत आहे असें कळवितात.

# ३७

१ हें ऐकून माझें हृदय थरथरून
स्थानभ्रष्ट होतें.
२ ऐका हो ऐका ! त्याच्या वाणीची गर्जना ऐका,
त्याच्या मुखांतून निघणारा ध्वनि ऐका.
३ तो त्यास नभोमंडळाखालीं सर्वत्र धाडितो,
विद्युल्लतेसह पृथ्वीच्या दिगंतरीं त्यास पाठवितो.
४ तिच्या मागून गर्जनेचा ध्वनि होतो;
तो आपल्या प्रतापी ध्वनीनें गर्जतो;
त्याचा शब्द ऐकूं येतो तेव्हां तो विद्युल्लतेचें चमकणें थांबवीत नाहीं.
५ देव अद्भुत शब्दानें गर्जतो;
आम्हांस अगम्य अशीं मोठीं कृत्यें तो करितो.
६ तो हिमाला म्हणतो, पृथ्वीवर पड;
पावसाच्या सरीला व भारी पर्जन्यवृष्टीला तो असेंच म्हणतो.
७ त्यानें उत्पन्न केलेल्या सर्व मानवांनीं त्याला ओळखावें,
म्हणून तो प्रत्येक मनुष्याच्या हातचा व्यवसाय बंद करितो.
८ तेव्हां वनपशु आश्रयास शोधितात
व आपल्या गुहांत पडून राहतात.
९ वावटळ आपल्या खजिन्यांतून निघून येते,
उत्तरेकडील वाऱ्यांमुळें थंडी येते.
१० देवाच्या श्वासाच्या फुंकरानें हिम होतें,
तेव्हां विस्तीर्ण जलाशय गोठून जातात.
११ तो मेघ जलपूर्ण करितो;
तो आपल्या विद्युल्लतेचें अभ्र चोहोंकडे पसरितो.
१२ ते त्याच्या सूत्रानें चोहोंकडे फिरतात;
म्हणजे अर्थात् त्यांस आज्ञापिलेलें कार्य ते अखिल भूपृष्ठावर करितात;
१३ शिक्षेसाठीं असो, त्याच्या ह्या पृथ्वीच्या हितासाठीं असो,
किंवा दया करण्यासाठीं असो, तो त्यांस पाठवितो.
१४ ईयोबा, कान देऊन हें ऐक;
स्तब्ध राहून देवाच्या अद्भुतकृत्यांचें मनन कर.
१५ देव मेघांना आज्ञा देऊन त्यांचा प्रकाश चमकावयास कसा लावितो,
हें तुला कळतें काय ?
१६ मेघ कसे समतोल राहतात हें तुला कळतें काय ?
त्या सर्वज्ञाच्या अद्भुतकृत्यांचें मर्म, तूं जाणतोस काय ?
१७ दक्षिणेकडील वाऱ्यानें पृथ्वी निर्वात होते
तेव्हां तुझीं वस्त्रें कशीं तापतात ?
१८ ओतींव आरशासारखें भक्कम नभोमंडळ त्याच्याप्रमाणें तुला विस्तारितां येईल काय ?
१९ त्याच्याशीं काय बोलावें हें आम्हांस शिकीव;
अंधकारामुळें आम्हांस शब्दयोजना करितां येत नाहीं.
२० मी बोलणार असें त्याला सांगावयाचें काय ?
असें सांगून कोणी आपला नाश करून घेईल काय ?
२१ आतां मेघमंडळांतील देदीप्यमान सूर्यप्रकाश दिसत नाहीं;
पण वारा सुटून तें स्वच्छ करितो.
२२ उत्तर दिशेकडून सुवर्णप्रभा येते;
देव भयानक तेजानें वेष्टित आहे.

२३ सर्वसमर्थ तर अगम्य आहे,
त्याचें सामर्थ्य अप्रतिम आहे;
तो न्याय व धर्म विपरीत करीत नाहीं;
२४ म्हणून मनुष्यें त्याचें भय धरितात;
जे शहाणपणाचा अभिमान वाहतात,
त्यांजकडे तो लक्ष देत नाहीं.

३८ १ तेव्हां परमेश्वरानें वावटळींतून ईयोबास
उत्तर दिलें; तो म्हणाला,
२ अज्ञानाचे शब्द बोलून
दिव्य संकेतावर अंधकार पाडणारा हा कोण?
३ आतां मर्दाप्रमाणें आपली कमर बांध;
मी तुला हें विचारितों; मला सांग.
४ मीं पृथ्वीचा पाया घातला तेव्हां तूं कोठें होतास?
तुला समजण्याची अक्कल असेल तर सांग.
५ तिचें मोजमाप कोणीं ठरविलें बरें?
तिला मापनसूत्र कोणीं लाविलें?
हें तुला ठाऊक आहे काय?
६ तिच्या स्तंभांचा पाया कशावर घातला?
तिची कोनशिला कोणीं बसविली?
७ त्या समयीं प्रभातनक्षत्रांनीं मिळून गायन केलें
व सर्व देवकुमारांनीं जयजयकार केला.
८ समुद्र उफळून गर्भाशयांतून पडावा असा बाहेर पडला
तेव्हां त्यास कवाडें लावून तो कोणीं अडविला?
९ त्या समयीं मीं त्यास मेघवस्त्राचें पांघरूण घातलें,
दाट अभ्रांचें त्यास बाळंतें केलें;
१० मीं त्याची मर्यादा फोडून काढिली
आणि त्यास अडसर व दरवाजे लाविले;
११ आणि मी म्हणालों तूं येथवरच ये; यापलीकडे
तुला येतां कामा नये;
येथें तुझ्या उन्मत्त लहरी थांबल्या पाहिजेत.
१२ तूं जन्मांत कधीं प्रातःसमयाचें नियमन केलें
आहे काय?
प्रभातेला आपलें स्थान दाखवून दिलें आहे काय?
१३ यासाठीं कीं त्यानें पृथ्वीच्या दिगंतांस धरून
तीवरील दुष्टांस झटकून टाकावें;
१४ तेव्हां मुद्रेच्या ठशानें जसा मातीला आकार येतो,
तसा प्रभातेनें पृथ्वीचा आकार व्यक्त होतो;
सर्व वस्तु जशा काय त्याच्या पेहरावाप्रमाणें ठळक
दिसतात.
१५ दुष्टांना त्यांचा प्रकाश नाहींसा होतो;
त्यांचा उगारलेला हात मोडतो.
१६ समुद्राच्या झऱ्यापर्यंत तुझा कधीं रिघाव झाला
आहे काय?
सागराच्या खोल प्रदेशीं तूं कधीं भ्रमण केलें
आहे काय?
१७ मृत्युद्वारें तुला दृष्टिगोचर झालीं आहेत काय?
तूं अधोलोकाचीं द्वारें पाहिलीं आहेत काय?
१८ पृथ्वीच्या विस्ताराचें तुला आकलन झालें आहे
काय?
तुला हें सर्व ठाऊक असेल तर सांग.
१९ प्रकाश वसतो तिकडची वाट कोणती?
अंधकाराचें स्थान कोठें आहे?
२० त्यास त्याच्या प्रदेशाच्या सीमेपर्यंत नेऊन तुला
पोंचवितां येईल काय?
त्याच्या गृहाच्या वाटा तूं ओळखितोस काय?
२१ हें सर्व तुला ठाऊक असेलच;
कारण त्या वेळीं तूं जन्मला असावास;
तूं बहुत दिवसांचा म्हणावयाचा.
२२ तूं हिमाच्या भांडारांत जाऊन शिरला आहेस काय?
तूं गारांचीं भांडारें पाहिलीं आहेत काय?
२३ तीं मीं संकटसमयासाठीं,
लढाई व युद्ध यांच्या प्रसंगासाठीं राखून ठेविलीं
आहेत.
२४ प्रकाशाची वांटणी कशी झाली आहे?
पूर्वेचा वारा पृथ्वीवर कसा पसरतो?
२५ पर्जन्याचा लोट खालीं यावा म्हणून पाट कोण
फोडितो?
गर्जनाऱ्या विद्युल्लतेला मार्ग कोण करितो?
२६ अशासाठीं कीं निर्जन प्रदेशांत,

मनुष्यहीन अरण्यांत पाऊस पडावा,
२७ उजाड व वैराणप्रदेश तृप्त करावा,
कोवळी हिरवळ उगवेशी करावी.
२८ पर्जन्याला कोणी पिता आहे काय ?
दहिंवरबिंदूंस कोण जन्म देतो ?
२९ हिम कोणाच्या गर्भाशयांतून निघतें ?
आकाशांतील हिमकणांस कोण जन्म देतो ?
३० जल थिजून पाषाणाप्रमाणें घट्ट होतें;
जलाशयाचा पृष्ठभाग गोठून जातो.
३१ कृत्तिकांचा गुच्छ तुला गुंफितां येईल काय ?
मृगशीर्षाचे बंध तुला सोडितां येतील काय ?
३२ राशिचक्र योग्य समयीं तुला उदयास आणितां येईल काय ?
सप्तर्षींस त्यांच्या संततीसह तुला मार्ग दाखवितां येईल काय ?
३३ आकाशमंडळाचे नियम तुला माहीत आहेत काय ?
पृथ्वीवर त्याची सत्ता तुला नेमून देतां येईल काय ?
३४ तुजवर विपुल जलवर्षाव व्हावा
म्हणून मेघांस तुला पुकारून सांगतां येईल काय ?
३५ विद्युल्लता तुझ्या आज्ञेत आहेत काय ?
आणि त्या येऊन, काय आज्ञा, असें तुला म्हणतात काय ?
३६ घनमेघांत अक्कल कोणीं घातली ?
अभ्रांस समज कोणीं दिली ?
३७ कोणास आपल्या बुद्धिसामर्थ्यानें मेघांची हजिरी घेतां येते ?
आकाशचे बुधले कोण ओतितो ?
३८ तेव्हां धूळ भिजून गोळा बनतो
व ढेंकळें विरघळून एकमेकांस चिकटून जातात.
३९ तुला सिंहिणीची शिकार करितां येते काय ?
तरुण सिंहाची क्षुधा तुला तृप्त करितां येते काय ?
४० ते गुहांत दबा धरून बसतात,
जाळींत दडून टपून बसतात.
४१ कावळ्याचीं पिलें देवाला हाका मारितात
तीं अन्नान्न करीत चोहोंकडे भटकतात,
तेव्हां त्यांस तें कोण देतो ?

३९ १ पहाडी रानशेळ्या विण्याचा काळ तुला ठाऊक आहे काय ?
हरिणी केव्हां प्रसवतात हें तुला कळलें काय ?
२ त्यांचे महिने केव्हां भरतात याचें गणित तुला करितां येतें काय ?
त्यांचा प्रसवकाळ तुला कळतो काय ?
३ त्या ओणवून आपलीं पिलें वितात;
त्या प्रसूतिवेदनांपासून मुक्त होतात.
४ त्यांचीं पिलें धष्टपुष्ट होऊन रानांत वाढतात;
तीं त्यांना सोडून जातात, त्यांकडे परत येत नाहींत.
५ रानगाढवास कोणीं स्वैर फिरूं दिलें ?
त्याला बंधमुक्त कोणीं केलें ?
६ त्याचें निवासस्थान
मीं रुक्ष मैदानांतील क्षारभूमि केलें आहे.
७ नगरांतील गजबजीचा त्याला तिटकारा असतो;
हाकणाऱ्याचा शब्द त्याच्या कानीं पडत नाहीं.
८ डोंगरांवर जें कांहीं सांपडेल तें त्याचा चारा;
तो हरतऱ्हेची हिरवळ शोधीत फिरतो.
९ गवा तुझी सेवा करण्यास मान्य होईल काय ?
तो रात्रीचा गव्हाणींत राहील काय ?
१० त्याच्या गळ्यांत जुंपणी बांधून त्याला शेताच्या तासांत तूं चालवशील काय ?
तो तुझ्यामागून खोऱ्यांतील जमीन कोळपील काय ?
११ त्याचें बळ मोठें आहे म्हणून तूं त्यावर भिस्त ठेवशील काय ?
अथवा त्यावर आपलें काम सोपवशील काय ?
१२ तो तुझें धान्य घरीं आणील व तुझ्या खळ्यांतलें धान्य जमा करील
असा त्याचा तुला भरंवसा आहे काय ?
१३ शहामृगीचे पंख आनंदानें फडफडतात;
तिचे पिसारे व पर ममता करण्याच्या कामीं पडतात काय ?
१४ ती आपलीं अंडीं जमिनीच्या हवालीं करिते

तीं धुळीनें उबवितें.
१५ तीं कोणाच्या पायाखालीं चिरडतील,
किंवा कोणी वनपशु तीं तुडवील, याचें तिला भान नसतें.
१६ ती आपल्या पिलांशीं अशी निर्दयतेनें वागते कीं जशीं काय तीं तिचीं नव्हतच;
आपले श्रम निष्फळ झाले तरी ती निश्चिंत राहते;
१७ कारण देवानें तिला बुद्धिहीन असें उत्पन्न केलें आहे;
तिच्या वांट्याला अक्कल आली नाहीं.
१८ ती आपली मान उंच उभारून आपले पंख फडफडावीत धावते,
तेव्हां ती घोड्याला व स्वाराला हसते.
१९ घोड्यास बळ तूं देतोस काय ?
त्याच्या मानेला हलणाऱ्या आयाळीचें पांघरूण तूं घालतोस काय ?
२० त्यास टोळाप्रमाणें उड्या मारण्यास तूं लावतोस काय ?
त्याच्या फुरफुरण्याचा तोरा भयंकर असतो.
२१ तो मैदानांत टापा मारितो,
तो आपल्या बळाचा अभिमान मिरवितो,
तो हत्यारबंद शिपायांशीं सामना करण्यास पुढें सरसावतो.
२२ तो भीतीस हसतो, व घाबरत नाहीं,
तरवारीपासून मागें हटत नाहीं.
२३ भाता, चमकणारा भाला व बरची
हीं त्यावर आपटून खणखणतात.
२४ तो उग्रतेनें व क्रोधानें जमीन तोडून जातो;
रणशिंगाचा नाद ऐकतांच तो अनावर होतो.
२५ रणशिंग जेव्हांजेव्हां वाजतें तेव्हां तो अहा ! म्हणतो;
लढाई, सरदारांची गर्जना व रणशब्द यांचा वास तो दुरून काढतो.
२६ ससाणा तुझ्या चातुर्यानें उडतो
आणि दक्षिणेकडे उडून जाण्यास तो पंख फडफडावितो काय ?
२७ गरुड तुझ्या आज्ञेनें भरारी मारितो
व उंच ठिकाणीं घरटें करितो काय ?
२८ तो खडकांत वस्ती करितो;
खडकाच्या सुळक्यावर दुर्गमस्थानीं आपलें कोटें करितो.
२९ तेथून तो आपलें भक्ष्य निरखितो;
त्याच्या नेत्रांस तें दूरवर दिसतें.
३० त्याचीं पिलें रक्त चाखितात;
जेथें वध पावलेले असतात तेथें तो असतो.

# ४०

१ परमेश्वरानें ईयोबाला आणखी म्हटलें,
२ हा बोल लावणारा सर्वसमर्थाशीं आतां वाद घालील काय ?
देवाशीं वाद घालणाऱ्यानें आतां उत्तर द्यावें.

३ मग ईयोबानें परमेश्वराला उत्तर केलें,
४ पाहा, मी तर पामर आहें,
मी तुला काय उत्तर देऊं ?
मी आपला हात आपल्या तोंडावर ठेवितों.
५ एकदा मी बोललों खरा, पण आतां मी तुला कांहीं जाब देणार नाहीं;
मी दोनदाहि बोललों, पण आतां पुनः बोलणार नाहीं.

६ मग परमेश्वरानें वावटळींतून ईयोबास उत्तर दिलें; तो म्हणाला :
७ आतां मर्दाप्रमाणें आपली कमर बांध;
मी तुला विचारितों, मला सांग.
८ तूं माझें न्याय्यत्व खोटें पाडूं पाहतोस काय ?
आपण निर्दोषी ठरावें म्हणून तूं मला दोषी ठरवितोस काय ?
९ देवाच्यासारखा तुझा भुज आहे काय
त्याच्या वाणीप्रमाणें तुला गर्जना करितां येते काय ?
१० तूं आपणास महिमा व प्रताप यांनीं भूषित कर;

तेज व ऐश्वर्य ही धारण कर.
११ तुझ्या क्रोधाला भरतें येऊं दे,
आणि प्रत्येक गर्विष्ठास पाहून त्याची मानखंडना कर.
१२ प्रत्येक गर्विष्ठास पाहून त्याला खालीं पाड
आणि दुष्टांस जागच्या जागीं तुडीव.
१३ त्या सर्वांस मातीस मिळीव;
त्यांचीं तोंडें काळोखांत राहतील असें त्यांला बांधून टाक.
१४ मग तुझा उजवा हात तुझा उद्धार करितो,
अशी तुझी मीहि प्रशंसा करीन.
१५ तुजबरोबर निर्माण केलेल्या बेहेमोथास[1] पाहा;
तो बैलाप्रमाणें गवत खात असतो.
१६ पाहा, त्याच्या कमरेंत ताकद असते;
त्याच्या पोटाच्या स्नायूंत सामर्थ्य असतें.
१७ देवदारूच्या फांदीसारखें तो आपलें शेपूट हालवितो;
त्याच्या जांघांचे स्नायु एकमेकांशीं जोडलेले असतात.
१८ त्याचीं हाडें जशा काय पितळेच्या नळ्या,
त्याच्या फासोळ्या जसे काय लोखंडाचे गज.
१९ तो देवाची प्रमुखकृति आहे;
त्याच्या निर्माणकर्त्यानें त्याला तरवारीनें सज्ज केलें आहे.
२० डोंगर त्याला चारा पुरवितात;
तेथें सर्व वनपशु क्रीडा करितात.
२१ तो कमलिनींखालीं, लव्हाळ्याच्या बेटांत
व दलदलींत पडून राहतो.
२२ कमलिनी त्यावर छाया करितात;
ओहोळांतले वाळुंज त्याला घेरितात.
२३ पाहा, नदीच्या पुराचा लोट त्यावर आला तरी तो डगमगत नाहीं;
यार्देनेसारख्या नदीचा प्रवाह झपाट्यानें वाहून त्याच्या तोंडावर आदळला
तरी तो निर्भय राहतो.
२४ तो सावध असतां त्याला कोण धरील ?
पाशांत पकडून त्याच्या नाकांत वेसण कोण घालील ?

४१ १ लिव्याथानास[1] गळ घालून तुला ओढितां येईल काय ?
दोरीनें त्याची जीभ तुला दाबून धरितां येईल काय ?
२ त्याच्या नाकांत लव्हाळ्याची वेसण तुला घालितां येईल काय ?
त्याच्या जबड्यांत गळ रोवितां येईल काय ?
३ तो तुझें आर्जव करीत राहील काय ?
तो तुजशीं लाडीगोडी लावील काय ?
४ मी तुझा सतत दास होऊन राहीन,
अशी आणभाक तो तुजशीं करील काय ?
५ लहान पक्ष्याशीं खेळतात तसा तूं त्याशीं खेळशील काय ?
त्याला बांधून तुझ्या कुमारींस तो खेळवयास देशील काय ?
६ धीवरांचे संघ त्याचा व्यापार करितील काय ?
त्याला विभागून ते व्यापाऱ्यांला[2] देतील काय ?
७ त्याच्या कातडींत तूं शूळ भरून देशील काय ?
मासे मारण्याच्या बरच्या त्याच्या डोकींत खुपसशील काय ?
८ तूं त्याला हात लावून तर पाहा,
त्या झटापटीची आठवण तुला पक्की राहील;
आणि पुनः तूं तसें करावयाचा नाहींस.
९ पाहा त्याला धरूं पाहणाऱ्याची आशा निष्फळ होते;
त्याला पाहूनच एकादा गांगरून जाणार नाहीं काय ?
१० त्याला चिडविण्याचें धाडस कोणी करणार नाहीं;
तर मग मजसमोर टिकेल असा कोण आहे ?
११ मला कोणीं प्रथम कांहीं दिलें आहे काय कीं मी त्याची फेड करूं ?

---

१ म्हणजे जलघोटकास

१ म्हणजे मगरास
२ मुळांत : कनान्यांला (जखऱ्या १४:२१ पाहा)

अखिल नभोमंडळाखालीं जें कांहीं आहे तें
माझें आहे.
१२ त्याचे अवयव, त्याचें महाबल, त्याचा सुंदर बांधा
यांविषयीं बोलण्याचा मी राहणार नाहीं.
१३ त्याचें वरलें आवरण कोणाला काढून घेतां येईल?
त्याच्या दाढांत कोणाला शिरकाव करितां येईल?
१४ त्याच्या तोंडाचीं कवाडें कोणास उघडितां येतील?
त्याचे दांत चोहोंकडून विक्राळ आहेत;
१५ त्याच्या कवचांच्या रांगांचा त्याला अभिमान
वाटतो;
तीं जशीं काय परस्परांस जखडून टाकिलीं आहेत.
१६ तीं एकमेकांशीं जडलेलीं आहेत;
त्यांमधून हवेचा प्रवेश होत नाहीं.
१७ तीं एकमेकांशीं जुळलेलीं व चिकटलेलीं आहेत;
तीं सुटीं करितां येत नाहींत.
१८ तो शिंकला म्हणजे प्रकाश चमकतो;
त्याचे डोळे प्रभातनेत्रांसारखे आहेत.
१९ त्याच्या तोंडांतून ज्वाळा निघतात,
अग्नीच्या ठिणग्या उडतात.
२० लव्हाळ्यांच्या जाळावर उकळत ठेवलेल्या
भांड्यांतून निघतो
तसा त्याच्या नाकपुड्यांतून धूर निघतो.
२१ त्याच्या श्वासानें कोळसे पेट घेतात;
त्याच्या तोंडांतून अग्निज्वाला निघते.
२२ त्याच्या मानेंत बळ असतें;
त्याच्यापुढें दहशत थईथई नाचत असते.
२३ त्याचे मांसल भाग दाट असतात;
ते त्याच्या अंगांत घट्ट बसलेले असतात, हालत
नाहींत.
२४ त्याचा ऊर पाषाणासारखा कठीण आहे;
जात्याच्या खालच्या तळीसारखा तो कणखर आहे.
२५ त्यानें डोकें वर केलें कीं वीरहि घाबरतात;
भीतीनें त्यांची गाळण उडते.
२६ कोणीं त्यावर तरवार चालविली तर ती त्याला
लागत नाहीं;
भाला, बरची, तीर हीं कांहींच त्याला लागत
नाहींत.
२७ तो लोखंडास कस्पटासमान,
पितळेस कुजलेल्या लाकडासमान लेखितो.
२८ बाण त्यास पळवीत नाहीं;
गोफणगुंडे त्याला भुसासारखे लागतात.
२९ गदा तो कस्पटासमान लेखितो;
परजणाऱ्या भाल्यास तो हसतो.
३० त्याच्या अंगाचे खालचे भाग तीक्ष्ण धारेच्या खापऱ्यां-
सारखे आहेत;
तो चिखलावर जसा काय कुळव फिरवितो.
३१ तो सागर रांजणासारखा घुसळतो;
तो समुद्र मलमाच्या भांड्यासारखा करून
सोडितो.
३२ तो आपल्या मागून पाण्याचा माग प्रकाशयुक्त करितो;
तेव्हां सागर शुभ्रकेशधाऱ्यासारखा भासमान होतो.
३३ जन्मतःच भीतिविरहित
असा भूतलावर त्याजसारखा कोणी नाहीं.
३४ तो उंच असलेल्या सर्वांकडे नजर लावण्यास भीत
नाहीं;
तो सर्व उन्मत्त पशूंचा राजा आहे.

४२ १ मग ईयोब परमेश्वराला म्हणाला,
२ तुला सर्व कांहीं करितां येतें;
तुझ्या कोणत्याहि योजनेला प्रतिबंध होणें
नाहीं
असें मला कळून आलें आहे.
३ अज्ञानानें दिव्य संकेतावर अंधकार पाडणारा असा हा
कोण? तो मी.
यास्तव मला समजत नाहीं तें मी बोललों,
तें माझ्या आटोक्याबाहेरचें अद्भुत आहे, तें मला
कळलें नाहीं.
४ आतां ऐक; मी बोलतों!
मी तुला विचारितों, तूं मला बोध कर.
५ मीं तुजविषयीं कर्णोपकर्णी ऐकलें होतें,

आतां तर प्रत्यक्ष डोळ्यांनीं मी तुला पाहत आहें;
६ म्हणून मी माघार घेऊन
धूळराखेंत बसून पश्चात्ताप करीत आहें.

७ परमेश्वराचें ईयोबाबरोबर हें बोलणें झाल्यावर
तो अलीफज तेमानीला म्हणाला, तुजवर आणि तुझ्या
दोन्ही मित्रांवर मी संतप्त झालों आहें, कारण मजविषयीं
माझा सेवक ईयोब जसें यथार्थ बोलला, तसें तुम्ही
बोलला नाहीं ८ तर आतां तुम्ही सात बैल व सात
एडके घेऊन माझा सेवक ईयोब याजकडे जा व
आपल्यासाठीं होमबलि अर्पण करा; मग माझा सेवक
ईयोब तुम्हांसाठीं प्रार्थना करील; कारण मी त्याज-
वरच अनुग्रह करीन; म्हणजे मग माझा सेवक
ईयोब जसें मजविषयीं यथार्थ बोलला तसें तुम्ही बोललां
नाहीं, या तुमच्या मूर्खपणाचें फळ तुम्हांस मिळणार नाहीं.
९ हें ऐकून अलीफज तेमानी, बिल्दद शूही व
सोफर नामाथी यांनीं जाऊन परमेश्वराच्या आज्ञे-
प्रमाणें केलें; आणि परमेश्वरानें ईयोबावर अनुग्रह केला.
१० ईयोबानें आपल्या मित्रांसाठीं प्रार्थना केली
तेव्हां परमेश्वरानें ईयोबाच्या दुःखाचा परिहार केला;
पूर्वी ईयोबाची मालमत्ता होती तिच्या दुप्पट परमेश्वरानें
त्याला दिली. ११ मग त्याचे सर्व बंधु व भगिनी
आणि पूर्वीचे त्याच्या ओळखीचे सर्व लोक त्याजकडे
आले, आणि त्यांनीं त्याच्या घरीं त्याच्या पंक्तीला
बसून भोजन केलें; आणि परमेश्वरानें त्याजवर जी
विपत्ति आणिली होती तीविषयीं दुःख प्रदर्शित करून
त्यांनीं त्याचें समाधान केलें; प्रत्येकानें त्याला एक
कसीता[1] व सोन्याची एक आंगठी दिली. १२ परमे-
श्वरानें ईयोबाचें उत्तरवय पूर्ववयाहून अधिक सुखसंपन्न
केलें; चौदा हजार मेंढरें, सहा हजार उंट, बैलांच्या
हजार जोड्या आणि हजार गाढवी इतक्यांचा तो
धनी झाला. १३ त्याला आणखी सात पुत्र व तीन
कन्या झाल्या. १४ एका कन्येचें नांव यमीमा,
दुसरीचें कसीया व तिसरीचें केरेनहप्पूक अशीं
त्यांचीं नांवें त्यानें ठेविलीं. १५ ईयोबाच्या कन्यां-
इतक्या सुंदर स्त्रिया सगळ्या देशांत नव्हत्या; त्यांच्या
बापानें त्यांस त्यांच्या भावांप्रमाणेंच वतन वांटून
दिलें. १६ त्यानंतर ईयोब एकशें चाळीस वर्षें जगला;
आणि त्यानें चार पिढ्यांपर्यंत आपले पुत्रपौत्र पाहिले.
१७ नंतर ईयोब वृद्ध व पुऱ्या वयाचा होऊन
मरण पावला.

१ एक विशिष्ट वजनाचें रुप्याचें नाणें.

# स्तोत्रसंहिता

## भाग पहिला

१ १ धन्य तो पुरुष, जो दुर्जनांच्या
मसलतीनें चालत नाहीं;
पापी जनांच्या मार्गांत पाऊल घालीत नाहीं;
आणि धर्मनिंदकांच्या बैठकींत बसत नाहीं,
२ तर परमेश्वराच्या शास्त्रांत रमतो,
त्याच्या शास्त्राचें अहोरात्र मनन करितो;
३ जें झाड पाण्याच्या प्रवाहाजवळ लाविलेलें असतें,
जें आपल्या हंगामीं फळ देतें,
ज्याचीं पानें कोमेजत नाहींत,
अशा झाडासारखा तो आहे;
आणि जें कांहीं तो हातीं घेतो तें सिद्धीस जातें.
४ दुर्जन तसे नाहींत.

ते वाऱ्यानें उडून जाणाऱ्या भुसासारिखे आहेत.
५ यामुळें दुर्जन न्यायसमयीं टिकावयाचे नाहींत;
पापी जन धार्मिकांच्या मंडळींत उभे राहावयाचे
नाहींत;
६ कारण धार्मिकांचा आयुःक्रम परमेश्वराला अवगत
असतो,
पण दुर्जनांचा आयुःक्रम नष्ट होतो.

२ १ राष्ट्रांनीं दंगल कां मांडिली आहे ?
लोक व्यर्थ योजना कां करीत आहेत ?
२ परमेश्वराविरुद्ध व त्याच्या अभिषिक्ताविरुद्ध
पृथ्वीवरले राजे उठले आहेत,
सत्ताधीश एकत्र होऊन मसलत करीत आहेत कीं
३ उठा, आपण त्यांचीं बंधनें तोडून टाकूं,
आपणांवरून त्यांच्या दोऱ्या फेकून देऊं.
४ स्वर्गांत जो सिंहासनारूढ आहे तो हसत आहे;
प्रभु त्यांचा उपहास करीत आहे.
५ पुढें तो त्यांच्याशीं क्रोधयुक्त होऊन बोलेल,
तो संतप्त होऊन त्यांस घाबरें करील.
६ तो म्हणेल, मीं आपल्या पवित्र सीयोन डोंगरावर
आपला राजा अधिष्ठित केला आहे.
७ मी निर्णय कळवितों :
परमेश्वर मला म्हणाला, तूं माझा पुत्र आहेस,
आज मीं तुला जन्म दिला आहे;
८ मजजवळ माग म्हणजे राष्ट्रें मी तुला वतनादाखल
देतों,
पृथ्वीच्या दिगंतांचें स्वामित्व तुला देतों;
९ लोहदंडानें तूं त्यांस ठेचशील;
कुंभाराच्या मडक्यासारखा त्यांचा चुराडा करिशील.
१० राजांनो, आतां शहाणे व्हा,
पृथ्वीवरील न्यायाधीशांनो, बोध घ्या.
११ भीड धरून परमेश्वराची सेवा करा,
कंपित होऊन हर्ष करा.
१२ पुत्रानें रागावूं नये आणि तुम्हीं वाटेनें नाश पावूं नये
म्हणून त्याचें चुंबन घ्या;
कारण त्याचा क्रोध त्वरित पेटेल;
त्याला शरण जाणारे सारे धन्य होत.

३ [ आपला पुत्र अबशालोम याच्यापुढून
दावीद पळाला त्या प्रसंगींचें स्तोत्र ]
१ हे परमेश्वरा, माझे शत्रु किती तरी झाले आहेत !
मजवर उठलेले बहुत आहेत.
२ याला देवाच्या ठायीं तारण नाहीं,
असें माझ्या जिवाविषयीं म्हणणारे पुष्कळ झाले
आहेत. [ सेला ]
३ तरी हे परमेश्वरा, तूं माझ्याभोंवतीं कवच आहेस;
तूं माझें गौरव, तूं माझें डोकें वर करणारा आहेस.
४ मी मोठ्यानें परमेश्वराचा धावा करितों,
आणि तो आपल्या पवित्र डोंगरांतून माझें
ऐकतो. [ सेला ]
५ मीं अंग टाकिलें व झोपीं गेलों;
मी जागा झालों, कारण मला परमेश्वराचा आधार
आहे.
६ लाखों लोकांनीं मला गराडा घातला आहे,
मीं त्यांस भ्यावयाचा नाहीं.
७ हे परमेश्वरा, ऊठ; माझ्या देवा, मला तार;
तूं माझ्या सर्व वैऱ्यांच्या तोंडांत मारिली आहे;
तूं दुर्जनांचे दांत पाडिले आहेत.
८ तारण परमेश्वराच्या हातून होतें;
तुझ्या लोकांना तुझा आशीर्वाद लाभो. [ सेला ]

४ [ मुख्य गवयासाठीं; तंतुवाद्यांच्या
साथीनें गावयाचें दाविदाचें स्तोत्र ]
१ हे माझ्या न्यायदात्या देवा,
मी तुझा धावा करितों तेव्हां माझें ऐक;
मला तूं पेचांतून मोकळें केलें आहे;
मजवर कृपा कर, माझी प्रार्थना ऐक.
२ अहो महाजनहो, माझ्या गौरवाची अप्रतिष्ठा
कोठवर चालणार ?
तुम्हांला वायफळ गोष्टी आवडणार काय ?

तुम्ही लबाडीची कास कोठवर धरणार ? [ सेला ]
३ तरी हें ध्यानांत ठेवा कीं,
परमेश्वरानें आपणासाठीं भक्तिमान इसम निवडून काढिला आहे;
मी परमेश्वराचा धावा करीन तेव्हां तो ऐकेल.
४ भीति बाळगा, पाप करूं नका;
शय्येवर पडून आपल्या मनाशीं विचार करा;
स्तब्ध राहा. [ सेला ]
५ धार्मिकतापूर्वक यज्ञ करा;
परमेश्वरावर भाव ठेवा.
६ आम्हांला चांगले दिवस कोण दाखवील
असें म्हणणारे पुष्कळ आहेत;
हे परमेश्वरा, तूं आपलें मुखतेज आम्हांवर पाड.
७ धान्य व द्राक्षारस यांची समृद्धि झाली
म्हणजे लोकांस आनंद होतो
त्यापेक्षां अधिक आनंद तूं माझ्या हृदयांत उत्पन्न केला आहे.
८ मी स्वस्थपणें पडून लागलाच झोपीं जातों,
कारण, हे परमेश्वरा, तूं मला एकांतांत निर्भय ठेवितोस.

५ [ मुख्य गवयासाठीं; वाजंत्र्यांच्या साथीनें गावयाचें दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, माझ्या बोलण्याकडे कान दे,
माझ्या चिंतनाकडे लक्ष दे.
२ हे माझ्या राजा, माझ्या देवा,
माझ्या धाव्याच्या वाणीकडे कान दे;
मी तुझी प्रार्थना करीत आहें.
३ हे परमेश्वरा, प्रातःकाळीं तूं माझी वाणी ऐकतोस;
सकाळीं मी प्रार्थना जुळवून ती तुला सादर करीन,
आणि तुझी प्रतीक्षा करीत राहीन.
४ कारण तूं दुष्टाईची आवड धरणारा देव नाहींस;
दुर्जनाला तुझ्याजवळ थारा नाहीं.
५ तुझ्या दृष्टीपुढें बढाई करणारे टिकणार नाहींत,
सर्व कुकर्म करणाऱ्यांचा तुला तिटकारा आहे.
६ असत्य भाषण करणाऱ्यांचा तूं नाश करितोस;
खुनी व कपटी मनुष्याचा परमेश्वराला वीट आहे.
७ मी तर तुझ्या अपार कृपेनें तुझ्या मंदिरांत येईन;
तुझी भीड धरून तुझ्या पवित्र स्थानाकडे तोंड करून दंडवत घालीन.
८ हे परमेश्वरा, माझ्यासाठीं शत्रु टपले आहेत,
म्हणून तूं मला आपल्या न्यायपथानें ने,
आपला मार्ग मजपुढें नीट कर.
९ त्यांच्या तोंडाचा भरंवसा नाहीं;
त्यांचें अंतर्याम केवळ खाच आहे;
त्यांचा घसा केवळ उघडें थडें आहे;
ते आपल्या जिव्हेनें गोडगोड बोलतात.
१० हे देवा, त्यांस दोषी ठरीव;
ते आपल्या मसलतींत फसोत;
त्यांच्या बहुत अपराधांस्तव त्यांस झुगारून दे,
कारण ते तुला जुमानीत नाहींत;
११ परंतु तुझा आश्रय करणारे सारे हर्ष करोत;
त्यांचें तूं रक्षण करितोस म्हणून ते सदा गजर करोत;
ज्यांस तुझें नाम प्रिय आहे ते तुझ्या ठायीं उल्लास पावोत.
१२ कारण तूंच धार्मिकाला आशीर्वाद देतोस;
हे परमेश्वरा, तूं कवचाप्रमाणें त्याला कृपाप्रसादानें वेष्टितोस.

६ [ मुख्य गवयासाठीं; तंतुवाद्यांच्या साथीनें आठव्या (नीच) स्वरावर गावयाचें दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, कोपानें मला शासन करूं नको;
संतापानें मला शिक्षा करूं नको.
२ हे परमेश्वरा, मी मलूल झालों आहे म्हणून मजवर दया कर;
माझीं हाडें कळकळत आहेत;
हे परमेश्वरा, मला बरें कर.
३ माझा जीव अगदीं घाबरा झाला आहे;
हे परमेश्वरा, हें कोठवर चालणार ?
४ हे परमेश्वरा, मजकडे वळ, माझा जीव सोडीव,

तूं आपल्या वात्सल्यास्तव मला तार;
५ कारण मृतावस्थेंत तुझें स्मरण कोणाला राहत नाहीं;
अधोलोकांत तुझें उपकारस्मरण कोण करणार !
६ मी कण्हून कण्हून थकलों आहें,
रोज रात्रीं मी आपलें अंथरूण आसवांत पोहविनों;
मी आपला पलंग अश्रूंनीं भिजवितों.
७ शोकानें माझी दृष्टि क्षीण झाली आहे;
माझ्या सर्व शत्रूंमुळें माझे नेत्र जीर्ण झाले आहेत.
८ अहो दुष्कर्म्यांनो, तुम्ही सर्व माझ्यापुढून निघून जा,
कारण परमेश्वरानें माझा आक्रोश ऐकला आहे.
९ परमेश्वरानें माझी विनवणी ऐकली आहे;
परमेश्वर माझी प्रार्थना मान्य करील.
१० माझे सर्व वैरी फजीत होतील व फार घाबरतील;
ते माघारे फिरतील, एकाएकीं लज्जित होतील.

७ [ बन्यामिनी कूश याच्या बोलण्यामुळें दाविदानें परमेश्वराला गाइलेलें क्षोभस्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, माझ्या देवा,
मीं तुझा आश्रय केला आहे;
माझ्या पाठीस लागणाऱ्या सर्वांपासून माझें रक्षण कर,
मला सोडीव;
२ नाहीं तर सिंहाप्रमाणें तो मला फाडून टाकील;
मला सोडविणारा नाहीं म्हणून माझे तो तुकडेतुकडे करील.
३ हे परमेश्वरा, माझ्या देवा,
मीं असें कांहीं केलें असेल,
माझ्या हातून अन्याय घडला असेल,
४ मजशीं मिळूनमिसळून असणाऱ्याचें मीं वाईट केलें असेल,
(मीं तर उलट निष्कारण झालेल्या आपल्या वैऱ्याला सोडविलें आहे,)
५ तर वैरी माझ्या पाठीस लागो, मला गांठो,
माझा जीव मातींत तुडवो,
आणि माझें गौरव धुळीस मिळवो. [ सेला ]
६ हे परमेश्वरा, तूं क्रोधाविष्ट होऊन ऊठ;
माझ्या शत्रूंच्या संतापाविरुद्ध उभा राहा;
माझ्यासाठीं जागृत हो,
तूं न्यायाची योजना केलीच आहे;
७ तुला लोकांचा समुदाय घेरो;
तूं पुनरपि त्यांच्यावर उच्चस्थानीं आरूढ हो.
८ परमेश्वर लोकांचा न्याय करितो;
माझ्या धार्मिकतेप्रमाणें व माझ्या ठायीं असलेल्या सात्विकतेप्रमाणें,
हे परमेश्वरा, माझा न्याय कर.
९ दुष्टाची दुष्टाई नष्ट होवो,
धार्मिकाला तूं खंबीर कर;
न्यायी देव हृदयें व अंतःकरणें पारखणारा आहे.
१० सरळ मनाच्यांस तारणारा देव
यानें माझी ढाल धरिली आहे.
११ देव न्यायपर न्यायाधीश आहे;
तो प्रतिदिनीं धाक दाखविणारा देव आहे.
१२ कोणी मनुष्य वळला नाहीं
तर त्याच्याविरुद्ध तो आपली तरवार पाजळितो,
त्यानें धनुष्य वाकवून सज्ज केलें आहे.
१३ त्याच्यासाठीं त्यानें प्राणघातक शस्त्रें सिद्ध केलीं आहेत;
त्यानें आपले अग्निबाण तयार केले आहेत.
१४ पाहा, तो दुष्कर्माच्या वेणा देतो;
उपद्रवाची गर्भधारणा करितो,
व असत्याला प्रसवतो.
१५ त्यानें खाडा खणून खोल केला;
आपल्या खाड्यांत आपणच पडला.
१६ त्यानें केलेला अपकार त्याच्याच शिरीं पडेल;
त्याचा बलात्कार त्याच्याच माथीं येईल.
१७ परमेश्वराच्या न्यायपरायणतेमुळें
मी त्याची स्तुति करीन;

परात्पर परमेश्वराच्या नामाचें स्तोत्र गाईन.

८

[ मुख्य गवयासाठीं; गित्ती चालीवर
गावयाचें दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, आमच्या प्रभो,
सर्व पृथ्वीवर तुझें नाम किती थोर आहे !
तूं आपलें वैभव आकाशभर पसरिलें आहे.
२ तूं बाळकें व तान्हुलीं यांच्या मुखानें सामर्थ्य स्थापीत केलें आहे;
तुला विरोधी आहेत म्हणून
आणि वैरी व सूड घेणारा यांस
कुंठित करावें म्हणून तूं असें केलें.
३ आकाश जें तुझें अंगुलिकार्य,
व त्यांत तूं नेमिलेले चंद्र व तारे यांजकडे पाहावें तर—
४ मर्त्य मनुष्य तो काय कीं तूं त्याची आठवण करावी ?
मानव तो काय कीं तूं त्याला दर्शन द्यावें ?
५ तूं त्याला देवापेक्षां किंचित् कमी असें केलें आहे;
त्याला गौरव व थोरवी यांनीं मुकुटमंडित केलें आहे.
६ तूं त्याला आपल्या हातच्या कृत्यांवरचें प्रभुत्व दिलें आहे,
तूं सर्व कांहीं त्याच्या पायांखालीं ठेविलें आहे.
७ शेरडेंमेंढरें, गुरेंढोरें हीं सारीं,
तसेंच वनपशु;
८ आकाशांतील पांखरें, समुद्रांतील मासे
व जलांत संचार करणारे सर्व प्राणी.
९ हे परमेश्वरा, आमच्या प्रभो,
सर्व पृथ्वीवर तुझें नाम किती थोर आहे !

९

[ मुख्य गवयासाठीं; मूथलाब्बेन या
रागावर गावयाचें दाविदाचें स्तोत्र ]

१ मी अगदीं मनापासून परमेश्वराचें उपकारस्मरण करीन;
तुझ्या सर्व अद्भुत कृतींचें वर्णन करीन.
२ मी तुझ्या ठायीं हर्ष व उल्लास पावेन;
हे परात्परा, मी तुझ्या नामाचें स्तवन गाईन.
३ माझे वैरी फिरून ठोकर खातात,
तुला पाहून नाश पावतात;
४ कारण तूं माझा कैवार घेऊन न्याय केला आहे;
तूं यथार्थ न्याय करीत सिंहासनावर बसला आहेस.
५ तूं राष्ट्रांस धमकाविलें आहे;
दुर्जनांचा तूं नाश केला आहे;
तूं त्यांचें नांव सदासर्वकाळ पुसून टाकिलें आहे.
६ वैऱ्यांचा समूळ नाश झाला आहे,
त्यांचा कायमचा नायनाट झाला आहे;
जीं शहरें तूं उजाड केलीं त्यांची
आठवण देखील नाहींशी झाली आहे.
७ परमेश्वर तर सर्वकाळ सिंहासनारूढ आहे;
त्यानें न्याय करण्याकरितां आपलें आसन स्थापिलें आहे.
८ तोच जगाचा यथार्थ न्याय करील;
तो लोकांना खरा न्याय देईल.
९ परमेश्वर पीडितांसाठीं उच्चदुर्ग आहे;
तो संकटसमयीं उच्चदुर्ग आहे;
१० ज्यांस तुझ्या नामाची ओळख आहे ते तुजवर भाव ठेवितील,
कारण, हे परमेश्वरा, जे तुला शरण आले त्यांस तूं टाकिलें नाहीं.
११ सीयोननिवासी परमेश्वराचें स्तवन करा,
त्याचीं कृत्यें राष्ट्रांराष्ट्रांस विदित करा;
१२ कारण रक्तपाताचा सूड उगविणाऱ्यास त्यांची आठवण आहे;
तो दीनांचा आक्रोश विसरला नाहीं.
१३ हे परमेश्वरा, मजवर दया कर,
मला मृत्युद्वारांतून उठविणाऱ्या,
माझा द्वेष करणाऱ्यांपासून मला झालेली पीडा पाहा;
१४ म्हणजे मी तुझी सारी कीर्ति वर्णीन;

तूं केलेल्या उद्धारास्तव मी सीयोनकन्येच्या
द्वारांसमोर हर्ष करीन.
१५ राष्ट्रें आपण केलेल्या खाचेंत स्वतःच पडलीं आहेत;
त्यांनीं गुप्तपणें मांडिलेल्या जाळ्यांत त्यांचेच पाय
गुंतले आहेत.
१६ परमेश्वरानें न्यायनिवाडा करून स्वतःला प्रगट केलें
आहे;
दुर्जनास त्याच्याच हातच्या पाशांत त्यानें गुंत-
विलें आहे. [ हिग्गायोन. सेला ]
१७ देवाला विसरणारीं सर्व राष्ट्रें
म्हणजे दुर्जन अधोलोकांत परत जातील.
१८ कंगालाचें नेहमींच विस्मरण होणार नाहीं;
दीनांच्या आशेचा सर्वदा भंग होणार नाहीं.
१९ हे परमेश्वरा, ऊठ;
मर्त्य मानवास प्रबळ होऊं देऊं नको;
राष्ट्रांचा न्यायनिवाडा तुजपुढें होऊं दे.
२० हे परमेश्वरा, त्यांस दहशत घाल;
आपण केवळ मर्त्य आहों असें त्यांस
कळूं दे. [ सेला ]

## १०

१ हे परमेश्वरा, तूं दूर कां राहतोस?
संकटसमयीं दृष्टीआड कां होतोस?
२ दुर्जनांच्या गर्वामुळें दीन दुःखानें होर-
पळून जातो;
ज्या युक्ति ते योजितात त्यांतच ते सांपडतात.
३ कारण दुर्जन आपल्या मनांतील हावेची शेखी
मिरवितो;
लोभिष्ट इसम परमेश्वराचा त्याग करून
त्याला तुच्छ मानितो.
४ दुर्जन नाक वर करून म्हणतो,
तो झडती घेणार नाहीं;
देव नाहीं असेच त्याचे सर्व विचार असतात.
५ त्याच्या युक्ति सर्वदा साधतात;
तुझे निर्णय त्याच्या अगदीं दृष्टीपलीकडे उच्च असे
असतात;
तो आपल्या सर्व शत्रूंवर फूत्कारतो.
६ तो आपल्या मनांत म्हणतो
मी ढळावयाचा नाहीं,
मी पिढ्यानपिढ्याहि विपत्तींत पडावयाचा नाहीं.
७ शाप, कपट व जुलूम यांनीं त्याचें तोंड भरलें
आहे;
उपद्रव व दुष्टाई त्याच्या जिव्हेशीं आहेत.
८ गांवांतील दडण्याच्या ठिकाणीं तो दबा धरून
बसतो;
गुप्त स्थळीं तो निरपराध्याचा घात करितो;
त्याचे डोळे लाचाराविरुद्ध टपलेले असतात.
९ जाळींत जसा सिंह तसा तो गुप्त स्थळीं टपून
बसतो;
तो दीनास धरावयास टपून बसतो;
दीनास आपल्या जाळ्यांत ओढून धरितो.
१० लाचाराचा चुराडा होऊन तो वाकून जातो,
आणि त्याच्या बळकट पंजांत सांपडतो.
११ तो आपल्या मनांत म्हणतो,
देवाला विसर पडला आहे,
त्यानें आपलें तोंड लपविलें आहे, तो हें कधींच
पाहणार नाहीं.
१२ हे परमेश्वरा, ऊठ; हे देवा, आपला हात उगार;
दीनास विसरूं नको.
१३ देवाला दुर्जन कां तुच्छ मानितो?
तूं झडती घेणार नाहींस असें तो आपल्या मनांत
कां म्हणतो?
१४ तूं हें पाहिलेंच आहे,
उपद्रव व दुःख यांचा बदला आपल्या हातानें
देण्यासाठीं
त्यांजकडे तूं नजर लावितोस;
लाचार तुजवर हवाला टाकितो;
पोरक्यांचा साहाय्यकर्ता तूं आहेस.
१५ दुर्जनांचा भुज मोडून टाक;
दुष्टाचें दुष्कर्म निःशेष होईपर्यंत त्याचा पिच्छा
पुरीव.

१६ परमेश्वर युगानुयुग राजा आहे;
त्याच्या देशांतून राष्ट्रें नष्ट झालीं आहेत.
१७ हे परमेश्वरा, तूं दीनांचा मनोरथ अगदीं पूर्ण
केला आहे;
त्यांचें मन तूं स्थिर करितोस;
१८ पोरक्यांस व पीडितांस न्याय मिळावा
आणि मृत्तिकेपासून बनलेल्या मनुष्यानें त्यांस इतःपर
दहशत घालूं नये म्हणून
तूं त्यांच्याकडे कान देतोस.

## ११

[ मुख्य गवयासाठीं; दाविदाचें स्तोत्र ]

१ मीं परमेश्वराचा आश्रय केला आहे;
तर तुम्ही माझ्या जिवाला असें कां म्हणतां कीं
तूं पक्ष्याप्रमाणें आपल्या डोंगराकडे उडून जा ?
२ पाहा, दुर्जन धनुष्य वाकवीत आहेत;
सरळ मनाच्यांस अंधारांत मारावयासाठीं दोरीला
तीर लावीत आहेत,
३ आधारस्तंभच ढासळले
तर धार्मिक काय करणार ?
४ परमेश्वर आपल्या पवित्र मंदिरांत आहे;
परमेश्वराचें सिंहासन स्वर्गांत आहे;
त्याचे नेत्र मानवांस पाहतात,
त्याच्या पापण्या त्यांस अजमावितात.
५ परमेश्वर धार्मिकाला कसास लावितो;
त्याला दुर्जन व बलात्कारप्रिय यांचा वीट येतो.
६ दुर्जनांवरतीं तो पाशावर पाश टाकील.
अग्नि, गंधक व दाहक वारा
यांचा प्याला त्यांच्या वांट्यास येईल.
७ कारण परमेश्वर न्यायी आहे;
त्याला धार्मिकता प्रिय आहे;
सरळांस त्याचें दर्शन होईल.

## १२

[ मुख्य गवयासाठीं; आठव्या ( नीच ) स्वरावर गावयाचें दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, साहाय्य कर, कारण कोणी भक्तिमान उरला नाहीं;
मानवजातींतले विश्वसनीय लोक नाहींतसे झाले
आहेत.
२ ते एकमेकांशीं असत्य भाषण करितात,
ते दुजाभाव ठेवून खुशामतीचे शब्द बोलतात.
३ खुशामत करणारे सर्व ओठ,
फुशारक्या मारणारी जिव्हा परमेश्वर कापून टाकील.
४ ते म्हणतात, आम्ही आपल्या जिव्हेनें प्रबल होऊं,
आमचे ओठ आमचेच आहेत,
आमचा धनी कोण ?
५ परमेश्वर म्हणतो, दीनांवरील
जुलमामुळें व कंगालांच्या उसाशांमुळें
मी आतां उठलों आहें,
ज्या आश्रयाचा सोस त्याला लागला आहे,
त्यांत मी त्यास सुरक्षित ठेवीन.
६ परमेश्वराचीं वचनें शुद्ध वचनें आहेत;
भट्टींत सात वेळां शुद्ध करून
भूमीवर ओतिलेल्या रुप्यासारखीं तीं आहेत.
७ हे परमेश्वरा, तूं त्यांस संभाळशील,
ह्या पिढीपासून तूं त्यांचा कायमचा बचाव करशील.
८ मानवजातींत नीचत्वाला उच्चपद प्राप्त झालें
म्हणजे दुर्जन चोहोंकडे मिरवत चालतात.

## १३

[ मुख्य गवयासाठीं, दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, तूं मला कोठवर विसरणार ? सर्वकाळ
काय ?
तूं मजपासून आपलें मुख कोठवर लपविणार ?
२ मीं कोठवर आपल्या मनांत बेत योजीत राहावें
आणि दिवसभर हृदयांत दुःख बाळगावें ?
कोठवर माझा शत्रु मजवर वरचढ करणार ?
३ हे परमेश्वरा, माझ्या देवा, मजकडे पाहा, माझें ऐक;
मला मृत्युनिद्रा येऊं नये म्हणून माझे डोळे
तेजस्वी कर;
४ नाहीं तर मीं याला जिंकिलें असें माझा वैरी
म्हणेल;

आणि मी ढळलों असतां माझे शत्रु उल्लासतील.
५ मी तर तुझ्या दयेवर भरंवसा ठेविला आहे;
माझें हृदय तूं सिद्ध केलेल्या तारणानें उल्लासेल.
६ परमेश्वरानें मजवर बहुत उपकार केले,
म्हणून मी त्यापुढें गायन करीन.

## १४ [ मुख्य गवयासाठीं दाविदाचें स्तोत्र ]

१ मूढ आपल्या मनांत म्हणतो, देव नाहीं;
लोक दुष्ट व अमंगळ कर्मे करितात,
सत्कर्म करणारा कोणी नाहीं.
२ कोणी समंजस आहे कीं काय,
कोणी देवभक्त आहे कीं काय,
हें पाहण्यासाठीं परमेश्वरानें मानवांकडे स्वर्गांतून अवलोकन केलें;
३ ते सर्व मार्गभ्रष्ट झाले आहेत;
एकूणएक बिघडले आहेत,
सत्कर्म करणारा असा कोणी नाहीं, एकहि नाहीं.
४ सर्व दुष्कर्म करणारे अगदीं ज्ञानशून्य आहेत काय ?
ते भाकरीप्रमाणें माझ्या लोकांस खातात,
परमेश्वराचें नाम घेत नाहींत.
५ पाहा, ते भयभीत झाले आहेत,
कारण देव धार्मिक लोकांत वसतो.
६ दीनाच्या विचारमसलतीची तुम्ही अवहेलना करितां,
पण त्याचा आश्रय परमेश्वर आहे.
७ देव करो आणि सीयोनांतून इस्राएलाचा उद्धार होवो.
परमेश्वर आपल्या लोकांचें दास्य उलटवील,
तेव्हां याकोब उल्लासेल, इस्राएल हर्ष पावेल.

## १५ [ दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, तुझ्या मंडपांत कोण वस्ती करील ?
तुझ्या पवित्र डोंगरावर कोण राहील ?
२ जो सात्त्विकतेनें चालतो व नीतीनें वागतो,
आपल्या मनापासून सत्य बोलतो,
३ आपल्या जिव्हेनें चुगली करीत नाहीं,
आपल्या सोबत्याचें वाईट करीत नाहीं,
आपल्या शेजाऱ्याची निंदा ऐकत नाहीं,
४ अधमाला तुच्छ लेखितो,
परमेश्वराचें भय बाळगणाऱ्यांचा सन्मान करितो,
आपण वाहिलेल्या शपथेनें स्वतःचें अहित झालें तरी ती मोडीत नाहीं,
५ आपला पैसा वाढीदिढीला लावीत नाहीं,
निरपराध्याची हानि करण्याकरितां लांच घेत नाहीं, तो;
जो असा वागतो तो कधीं ढळणार नाहीं.

## १६ [ दाविदाचें मिक्ताम स्तोत्र ]

१ हे देवा, माझें रक्षण कर,
कारण मीं तुझा आश्रय धरिला आहे.
२ मीं परमेश्वराला म्हटलें, तूंच माझा प्रभु आहेस,
तुजपरतें मला सुख नाहीं.
३ पृथ्वीवरील पवित्र जन हेच श्रेष्ठ होत,
त्यांच्या ठायीं माझा सर्व आनंद आहे.
४ जे परमेश्वराला सोडून अन्य देवाच्या भक्तीस लागतात त्यांना बहुत दुःखें होतील;
ते रक्तमय पेयार्पणें अर्पितात
तशीं मीं अर्पिणार नाहीं,
मी त्यांच्या देवांचें नांव घेणार नाहीं.
५ परमेश्वर माझ्या वतनाचा
व प्याल्याचा वांटा आहे;
माझा वांटा संभाळणारा तूंच आहेस.
६ मजसाठीं मापनसूत्रें रमणीय स्थानीं पडलीं आहेत;
माझें वतन माझ्या मनाजोगें आहे.
७ परमेश्वरानें मला बोध केला आहे,
त्याचा मी धन्यवाद करितों;
माझें अंतर्यामहि मला रात्रीं उपदेश करितें.

८ मीं आपल्यापुढें परमेश्वराला नित्य ठेविलें आहे;
तो माझ्या उजवीकडे आहे,
म्हणून मी ढळणार नाहीं.
९ यास्तव माझें हृदय आनंदित होतें,
माझा आत्मा उल्लासतो;
माझा देहहि सुरक्षित राहतो.
१० कारण तूं माझा जीव अधोलोकांत राहूं देणार नाहींस;
तूं आपल्या भक्तास गर्तेचा अनुभव घडूं देणार नाहींस;
११ जीवनाचा मार्ग तूं मला दाखविशील;
तुझ्या सान्निध्यांत पूर्णानंद आहे;
तुझ्या उजव्या हातांत सौख्यें सदोदित आहेत.

## १७ [ दाविदाची प्रार्थना ]

१ हे परमेश्वरा, न्यायवाद ऐक,
माझ्या आरोळीकडे लक्ष दे,
माझ्या निष्कपट मुखानें उच्चारिलेल्या प्रार्थनेकडे कान दे.
२ माझा निवाडा तुझ्यापुढें होवो;
तुझे डोळे समतेनें पाहतात.
३ तूं माझें हृदय पारखिलें आहे,
रात्रीं तूं माझी झडती घेतली आहे,
तूं मला तावूनसुलाखून पाहिलें आहे,
तरी तुला कांहीं आढळलें नाहीं;
मी मुखानें अतिक्रमण करणार नाहीं,
असा संकल्प मीं केला आहे.
४ मनुष्यांच्या कृत्यांविषयीं म्हटलें तर, तुझ्या तोंडच्या वचनानें
मीं आपणाला जबरदस्तांच्या
मार्गापासून दूर राखिलें आहे.
५ माझीं पावलें तुझ्या मार्गाला अगदीं धरून आहेत,
माझे पाय घसरले नाहींत.
६ मीं तुझा धावा केला आहे,
कारण, हे देवा, तूं माझें ऐकतोस;
मजकडे कान दे, माझें म्हणणें ऐक.
७ तुझा आश्रय करणाऱ्यांचें
त्यांच्या विरोध्यांपासून
तूं आपल्या उजव्या हातानें रक्षण करितोस;
तर तूं आतां विशेष वात्सल्य दाखीव.
८ मला डोळ्याच्या बाहुलीप्रमाणें राख,
आपल्या पंखांच्या छायेंत लपीव,
९ कारण दुर्जन मजवर जुलूम करितात,
माझे हाडवैरी मला घेरितात.
१० त्यांना चरबी दाटली आहे;
ते आपल्या मुखानें गर्वाचें भाषण करितात.
११ आतां ते पावलोपावलीं आम्हांस घेरीत आहेत;
ते आम्हांस धुळीस मिळविण्यास पाहत आहेत.
१२ भक्ष्य फाडण्यास उतावळा झालेला सिंह,
टपून बसलेला तरुण सिंह,
यांसारखा तो आहे.
१३ हे परमेश्वरा, ऊठ, त्याजशीं सामना कर, त्याला चीत कर;
आपल्या तरवारीनें दुर्जनापासून माझा जीव सोडीव.
१४ हे परमेश्वरा, आपलें वतन इहलोकींच आहे असें ज्यांस वाटतें,
ज्यांचें पोट तूं आपल्या भांडारांतून भरितोस,
अशा मानवांपासून, प्रापंचिक मानवांपासून आपल्या हातानें माझा जीव सोडीव;
ते संततींतच तृप्त असतात,
आणि आपण सांठविलेलें धन आपल्या मुलांसाठीं मागें ठेवितात.
१५ मी तर धार्मिक ठरून मला तुझ्या मुखाचें दर्शन घडो.
मी जागा होईन तेव्हां तुझ्या दर्शनानें माझी तृप्ति होवो.

## १८ [ मुख्य गवयासाठीं; परमेश्वराचा सेवक दावीद याचें स्तोत्र; परमेश्वरानें त्याला त्याच्या

सर्व वैऱ्यांच्या हातून व शौलाच्या हातून सोडविलें
त्या दिवशीं तो या वचनें गीतरूपानें परमेश्वरापुढें
बोलला तीं हीं:]

१ हे परमेश्वरा, माझ्या सामर्थ्या,
मी तुजवर प्रेम करितों.
२ परमेश्वर माझा दुर्ग, माझा गड, मला सोडविणारा,
माझा देव, माझा खडक आहे, त्याचा आश्रय मी करितों;
तो माझें कवच, माझें तारणशृंग, माझा उंच बुरूज आहे.
३ स्तुतिपात्र परमेश्वराचा मी धावा करितों,
तेव्हां शत्रूंपासून माझा बचाव होतो.
४ मृत्युबंधनांनीं मला वेष्टिलें,
नाशाच्या पुरांनीं मला घाबरें केलें.
५ अधोलोकाच्या बंधनांनीं मला घेरिलें,
मृत्युपाश मजवर आले.
६ मीं आपल्या संकटांत परमेश्वराचा धावा केला,
माझ्या देवाला मीं हाक मारिली;
त्यानें आपल्या मंदिरांतून माझी वाणी ऐकली,
मीं मारिलेली हाक त्याच्या कानीं गेली.
७ तेव्हां पृथ्वी हालली व कांपली,
पर्वतांचे पाये डळमळले,
त्यांला झोके बसले,
कारण तो संतप्त झाला होता.
८ त्याच्या नाकपुड्यांतून धूर निघत होता,
त्याच्या मुखांतून अग्नि निघून ग्रासीत चालला होता,
त्यामुळें निखारे धगधगत होते.
९ आकाश लववून तो खालीं उतरला;
त्याच्या पायांखालीं निबिड अंधकार होता.
१० तो करूबारूढ होऊन उडाला,
त्यानें वायूच्या पंखांनीं वेगानें उड्डाण केलें.
११ त्यानें आपणास काळोखानें आच्छादून घेतलें,
त्यानें आपणाला मेघमय अंधाराचा,
दाट ढगांचा मंडप केला.
१२ त्याजपुढील तेजानें घनमेघांमधून
गारा व धगधगीत इंगळ बाहेर पडले.
१३ परमेश्वरानें आकाशांत गर्जना केली,
परात्पराची वाणी झाली,
गारा व धगधगीत इंगळ पडले.
१४ त्यानें आपले बाण सोडून त्यांची दाणादाण केली;
त्यानें विजा पाडून त्यांची त्रेधा उडविली.
१५ तेव्हां हे परमेश्वरा, तुझ्या धमकीनें,
तुझ्या नाकपुड्यांतील श्वासाच्या सोसाट्यानें जलाशयाचे तळ दिसूं लागले,
पृथ्वीचे पाये उघडे पडले.
१६ त्यानें वरून हात लांब करून मला धरिलें,
आणि मोठ्या जलसंचयांतून मला बाहेर काढिलें.
१७ माझा बलाढ्य वैरी, माझे द्वेष्टे यांपासून मला त्यानें सोडविलें,
कारण ते मजहून अति बलिष्ठ होते.
१८ माझ्या विपत्कालीं ते मजवर चालून आलेह्या
तेव्हां परमेश्वर माझा आधार झाला.
१९ त्यानें मला प्रशस्त स्थलीं बाहेर आणिलें;
त्याचा प्रसाद मजवर होता म्हणून त्यानें मला सोडविलें.
२० परमेश्वरानें माझ्या धार्मिकतेप्रमाणें मला फळ दिलें;
माझ्या हातांच्या निर्मलतेप्रमाणें त्यानें मला प्रतिफळ दिलें.
२१ कारण मी परमेश्वराचे मार्ग धरून राहिलों,
मीं आपल्या देवाला सोडण्याची दुष्टाई केली नाहीं;
२२ त्याचे सर्व निर्णय माझ्या दृष्टीपुढें असत,
मीं त्याच्या विधींचा त्याग केला नाहीं.
२३ मी त्याच्याशीं निर्दोषतेनें वागत असें,
आणि मीं अधर्मापासून स्वतांला अलिप्त राखिलें.
२४ यास्तव परमेश्वरानें माझ्या धार्मिकतेप्रमाणें,
त्याच्या नजरेस आलेल्या माझ्या हातांच्या निर्मलतेप्रमाणें,
मला प्रतिफळ दिलें.
२५ दयाळू जनाशीं तूं दयेनें वागतोस;

सात्विकाशीं सात्विकतेनें वागतोस;
२६ शुद्धाशीं तूं शुद्ध भावनेनें वागतोस,
कुटिलाशीं तूं कुटिलतेनें वागतोस.
२७ दीनजनांस तूं तारितोस;
उन्मत्त दृष्टीच्या लोकांस नीच करितोस;
२८ तूं माझा दीप उजळितोस;
परमेश्वर माझा देव माझ्या अंधकाराचा प्रकाश करितो.
२९ तुझ्या साहाय्यानें मी फौजेवर चाल करून धावत जातों,
माझ्या देवाच्या साहाय्यानें मी तट उडून जातों.
३० देवाविषयीं म्हणाल तर त्याचा मार्ग अव्यंग आहे;
परमेश्वराचें वचन कसास लागलेलें आहे;
त्याचा आश्रय करणाऱ्या सर्वांची तो ढाल आहे.
३१ परमेश्वरापरता देव कोण आहे!
आमच्या देवापरता दुर्ग कोण आहे!
३२ तोच देव मला सामर्थ्याचा कमरबंद बांधितो,
तो माझा मार्ग नीटनेटका करितो.
३३ तो माझे पाय हरिणीच्या पायांसारखे करितो,
आणि उच्च स्थानीं माझी स्थापना करितो.
३४ तो माझ्या हातांस युद्धकला शिकवितो,
म्हणून माझे भुज पितळी धनुष्य वाकवितात.
३५ तूं मला आपली तारणरूप ढाल दिली आहे;
आपल्या उजव्या हातानें मला उचलून धरिलें आहे;
तुझ्या लीनतेमुळें मला थोरवी प्राप्त झाली आहे.
३६ तूं माझ्या पावलांसाठीं प्रशस्त जागा केली आहे,
माझे पाय घसरले नाहींत.
३७ मीं आपल्या वैऱ्यांच्या पाठीस लागून त्यांला आटोपिलें;
आणि त्यांचा नायनाट केल्याशिवाय परत फिरलों नाहीं.
३८ मीं त्यांस इतका मार दिला कीं त्यांस उठतां येईना;
त्यांस मीं पायांखालीं तुडविलें.
३९ लढाईकरितां तूं मला सामर्थ्याचा कमरबंद बांधिला;
मजवर उठलेल्यांस तूं माझ्याखालीं चीत केलें.
४० तूं माझ्या वैऱ्यांस पाठ दाखवावयास लाविलें,
मीं आपल्या द्वेष्ट्यांचा अगदीं संहार केला.
४१ त्यांनीं ओरड केली तरी त्यांस सोडवावयाला कोणी नव्हता;
त्यांनीं परमेश्वराचा धावा केला तरी त्यानें त्यांचें ऐकलें नाहीं.
४२ तेव्हां वाऱ्यानें उडणाऱ्या धुळीसारखें मीं त्यांचें चूर्ण केलें;
रस्त्यांवरील चिखलाप्रमाणें मीं त्यांस काढून टाकिलें.
४३ लोकांच्या बखेड्यांपासून तूं मला मुक्त केलें;
तूं मला राष्ट्रांचा प्रमुख केलें;
जे लोक माझ्या परिचयाचे नव्हते ते माझे अंकित झाले.
४४ माझी कीर्ति त्यांच्या कानीं पडतांच ते मला वश झाले;
परदेशीय लोकांनीं माझें आर्जव केलें.
४५ परदेशीय लोक गलित झाले,
ते आपल्या कोटांतून कांपत कांपत बाहेर आले.
४६ परमेश्वर जीवंत आहे;
त्या माझ्या दुर्गाचा धन्यवाद होवो;
माझें तारण करणाऱ्या देवाचा महिमा वाढो;
४७ त्याच देवानें मला सूड उगवूं दिला,
अन्य राष्ट्रांस माझ्या सत्तेखालीं आणिलें.
४८ तोच मला माझ्या वैऱ्यांपासून सोडवितो;
मजविरुद्ध उठणाऱ्यांवर तूं माझें वर्चस्व करितोस;
बलात्कारी मनुष्यापासून मला सोडवितोस.
४९ यास्तव हे परमेश्वरा, मी राष्ट्रांमध्यें तुझें स्तवन करीन,
तुझ्या नामाचीं स्तोत्रें गाईन.
५० तो आपल्या राजाला मोठें तारण देतो;
आपल्या अभिषिक्ताला,
दाविदाला व त्याच्या संततीला,

सर्वकाळ वात्सल्य दाखवितो.

## १९ [ मुख्य गवयासाठीं; दाविदाचें स्तोत्र ]

१ आकाश देवाचा महिमा वर्णितें;
अंतरिक्ष त्याची हस्तकृति दर्शवितें.
२ दिवस दिवसाशीं संवाद करितो,
रात्र रात्रीला ज्ञान सांगते.
३ वाचा नाहीं, शब्द नाहीं,
त्यांची वाणी ऐकूं येत नाहीं.
४ तरी त्यांचा स्वर सर्व पृथ्वी आक्रमितो,
त्यांचे शब्द दिगंतरीं पोहंचतात.
सूर्यासाठीं आकाशांत त्यानें मंडप घातला आहे.
५ शय्यागृहांतून वरासारखा तो बाहेर पडतो;
तो वीरपुरुषाप्रमाणें आपल्या मार्गानें धावण्यांत आनंद पावतो.
६ आकाशाच्या एका सीमेपासून निघून,
तो दुसऱ्या सीमेपर्यंत भ्रमण करीत जातो;
त्याच्या उष्णतेपासून कांहींएक सुटत नाहीं.
७ परमेश्वराचें नियमशास्त्र पूर्ण आहे,
तें मनाचें पुनरुज्जीवन करितें;
परमेश्वराचा निर्बंध विश्वसनीय आहे,
तो भोळ्यास समंजस करितो.
८ परमेश्वराचे विधि सरळ आहेत,
ते हृदयाला आनंदित करितात;
परमेश्वराची आज्ञा चोख आहे,
ती नेत्रांला प्रकाश देते.
९ परमेश्वराचें भय शुद्ध आहे,
तें सर्वकाळ टिकणारें आहे;
परमेश्वराचे निर्णय सत्य आहेत,
ते सर्वथैव न्याय्य आहेत.
१० ते सोन्यापेक्षां, बावनकशी सोन्याच्या राशीपेक्षां इष्ट आहेत,
ते मधापेक्षां, मोहोळांतून पाझरणाऱ्या मधापेक्षां गोड आहेत.
११ शिवाय त्यांपासून तुझ्या सेवकाला बोध होतो;
ते पाळिल्यानें मोठी फलप्राप्ति होते.
१२ स्वतांच्या चुका कोणाला दिसतात ?
गुप्त दोषांपासून मला मुक्त कर.
१३ तसेंच जाणूनबुजून घडणाऱ्या पातकांपासून आपल्या सेवकाला आवर;
त्यांची सत्ता मजवर न चालो,
म्हणजे मी पूर्ण होईन
आणि महापातकापासून अलिप्त राहीन.
१४ हे परमेश्वरा, माझ्या दुर्गा, माझ्या उद्धारका,
माझ्या तोंडचे शब्द व माझ्या मनचे विचार तुला मान्य असोत.

## २० [ मुख्य गवयासाठीं; दाविदाचें स्तोत्र ]

१ संकटाच्या दिवशीं परमेश्वर तुझें ऐको;
याकोबाच्या देवाचें नाम तुला उच्चपदीं स्थापो;
२ पवित्रस्थानांतून तो तुला साहाय्य पाठवो;
सीयोनांतून तो तुला आधार देवो;
३ तो तुझ्या सर्व अर्पणांचें स्मरण ठेवो,
तुझा होम त्याला मान्य होवो; [ सेला ]
४ तुझा मनोरथ तो पूर्ण करो,
तुझे सर्व संकल्प सिद्धीस नेवो.
५ तूं सिद्ध केलेल्या तारणामुळें आम्ही जयोत्सव करूं;
आमच्या देवाच्या नामाचा ध्वज उभारूं;
तुझ्या सर्व मागण्या परमेश्वर पुऱ्या करो.
६ परमेश्वर आपल्या अभिषिक्ताला तारितो,
हें मला आतां कळून आलें;
तो आपल्या उजव्या हाताच्या उद्धारक प्रतापाचीं कृत्यें करून
आपल्या पवित्र स्वर्गांतून त्याचें ऐकेल.
७ कोणी रथांची व कोणी घोड्यांची प्रशंसा मिरवितात;
आम्ही तर आमचा देव परमेश्वर याच्या नामाची प्रशंसा करूं.
८ ते वाकून खालीं पडले आहेत;
आम्ही तर उठून ताठ उभे आहों.
९ हे परमेश्वरा, तारण कर.

आम्ही धावा करितों तेव्हां राजानें आमचें ऐकावें.

२१ [ मुख्य गवयासाठीं दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, तुझ्या सामर्थ्यामुळें राजा हर्ष करितो;
तूं सिद्ध केलेल्या तारणामुळें त्याला केवढा उल्लास होतो!
२ त्याचा मनोरथ तूं पूर्ण केला आहे,
त्याच्या तोंडचें मागणें तूं अमान्य केलें नाहीं. [ सेला ]
३ कल्याणदायी वरदानें घेऊन तूं त्याला सामोरा येतोस.
तूं त्याच्या मस्तकीं शुद्ध सुवर्णाचा मुकुट घालितोस.
४ त्यानें तुजजवळ जीवन मागितलें;
तूं त्याला युगानयुगाचें दीर्घ आयुष्य दिलें.
५ तूं सिद्ध केलेल्या तारणानें त्याचें मोठें गौरव होतें;
तूं त्याला प्रताप व महिमा यांनीं भूषित करितोस.
६ तूं त्याला सर्वकाळ भरपूर बरकत देतोस;
तूं त्याला आपल्या समक्षतेनें आनंदित करितोस.
७ कारण परमेश्वरावर राजाची श्रद्धा आहे,
परात्पराच्या कृपेनें तो ढळणार नाहीं.
८ तुझा हात तुझ्या सर्व वैऱ्यांवर पडेल;
तुझा उजवा हात तुझ्या द्वेष्ट्यांवर पडेल.
९ तूं प्रगट होशील तेव्हां तूं त्यांस जळजळीत भट्टीसारखें करिशील;
परमेश्वर आपल्या क्रोधानें त्यांस ग्रासील,
अग्नि त्यांचा संहार करील.
१० त्यांचें फळ पृथ्वीवरून, त्यांचें बीज मानवजातींतून तूं नाहींसें करिशील.
११ कारण त्यांनीं तुझें अनिष्ट चिंतिलें;
त्यांनीं युक्ति योजिली ती त्यांस साधावयाची नाहीं.
१२ तूं त्यांस पाठ दाखवावयास लाविशील,
आपल्या धनुष्याची दोरी ओढून त्यांच्या मुखावर नेम धरिशील.
१३ हे परमेश्वरा, तूं आपल्या सामर्थ्यानें उच्च हो;
आम्ही गानवादन करून तुझा पराक्रम वाखाणूं.

२२ [ मुख्य गवयासाठीं; अय्येलेथ हाश्शहर (प्रभातहरिणी) या रागावर गावयाचें दाविदाचें स्तोत्र ]

१ माझ्या देवा, माझ्या देवा, तूं मला कां अंतरलास ?
माझा दुःखाचा आक्रोश ऐकून माझा बचाव करावयास तूं जवळ नाहींस.
२ माझ्या देवा, दिवसा मी धावा करितों तरी तूं ऐकत नाहींस;
रात्रींहि धावा करितों तरी मला चैन पडत नाहीं.
३ हे इस्राएलाच्या स्तवनांत वसणाऱ्या, तूं पवित्र आहेस.
४ आमचे पूर्वज तुजवर भाव ठेवीत;
ते तुजवर भाव ठेवीत आणि तूं त्यांस मुक्त करीत असस.
५ ते तुझा धावा करीत आणि मुक्त होत,
ते तुजवर भाव ठेवीत, आणि निराश होत नसत.
६ मी तर कीटक आहें, मानव नव्हें;
मनुष्यांनीं निंदिलेला, लोकांनीं धिक्कारिलेला आहें.
७ मला पाहणारे सर्व माझा उपहास करितात,
वाकुल्या दाखवितात, थट्टेनें डोकें हालवितात;
८ ते म्हणतात, परमेश्वरावर आपला हवाला टाक;
तो त्याला मुक्त करो;
तो त्याला सोडवो, तो त्याचा आवडता आहे.
९ मला उदरांतून बाहेर आणणारा तूंच आहेस;
मी आपल्या आईच्या अंगावर पीत होतों तेव्हां तूं मला
आपणावर भाव ठेवण्याची स्फूर्ति दिली.
१० मी जन्मलों तेव्हांपासून मला तुझ्या हातीं सोपलेलें आहे;
मातेच्या उदरांतून बाहेर पडलों तेव्हांपासून तूंच माझा देव आहेस.
११ मजपासून दूर राहूं नको, कारण संकट येऊन ठेपलें आहे;
आणि साहाय्य करणारा कोणी नाहीं.
१२ बहुत गोऱ्ह्यांनीं मला वेढिलें आहे;
बाशानच्या दांडग्या गोऱ्ह्यांनीं मला घेरिलें आहे.
१३ फाडून टाकणारा व गर्जना करणारा सिंह
जसा तसे ते तोंड वासून मजवर आले आहेत.
१४ मी पाण्यासारखा ओतला गेलों आहें,

माझ्या हाडांचे सर्व सांधे ढिले झाले आहेत;
माझें हृदय मेणासारखें झालें आहे;
तें आंतल्या आंत विरघळलें आहे.
१५ माझी शक्ति आटून खापरीसारखी झाली आहे;
माझी जीभ माझ्या टाळूस चिकटली आहे;
तूं मला मरणाच्या धुळीस मिळवीत आहेस.
१६ कुत्र्यांनीं मला वेढिलें आहे;
दुर्जनांच्या टोळीनें मला घेरिलें आहे;
त्यांनीं माझे हातपाय विंधिले आहेत.
१७ मला आपलीं सर्व हाडें मोजितां येतात;
ते मजकडे टक लावून पाहतात.
१८ ते माझीं वस्त्रें आपसांत वांटून घेतात
आणि माझ्या पेहरावावर चिठ्या टाकितात.
१९ हे परमेश्वरा, तूं दूर राहूं नको;
हे माझ्या सामर्थ्या, माझ्या साहाय्यासाठीं त्वरा कर.
२० तूं माझा जीव तरवारीपासून सोडीव;
कुत्र्याच्या पंजांतून माझा प्राण सोडीव.
२१ सिंहाच्या जबड्यापासून मला वांचीव;
गव्यांनीं मला शिंगावर घेतलें असतां तूं माझा धावा ऐकला.

२२ मी आपल्या बांधवांजवळ तुझ्या नामाची कीर्ति वर्णीन;
लोकसभेंत तुझें स्तवन करीन.
२३ अहो परमेश्वराचें भय धरणाऱ्यांनो, त्याचें स्तवन करा;
याकोबाचे वंशजहो, तुम्ही सर्व त्याचें गौरव करा;
इस्राएलाचे वंशजहो, तुम्ही सर्व त्याचें भय धरा.
२४ कारण त्यानें पीडिताची दैन्यावस्था तुच्छ लेखिली नाहीं व तिचा वीट मानिला नाहीं;
त्यानें आपलें मुख त्याच्या दृष्टीआड केलें नाहीं;
तर त्यानें धावा केला तेव्हां त्यानें तो ऐकला.
२५ महासभेंत तुजमुळेंच मी स्तवन करितों;
त्याच्या भक्तांसमक्ष मी आपले नवस फेडीन.
२६ दीन जन अन्न सेवन करून तृप्त होतील;
परमेश्वराला शरण जाणारे त्याची स्तुति करितील;
तुम्ही चिरंजीव असा.
२७ दिगंतरींचे सर्व जन परमेश्वराला स्मरून त्याजकडे वळतील;
सगळीं राष्ट्रकुळें तुला दंडवत घालितील.
२८ कारण राज्य परमेश्वराचें आहे;
तोच राष्ट्रांचा शास्ता आहे.
२९ पृथ्वीवरील सर्व थोर लोक भोजन करितील व त्याला भजतील;
धुळीस मिळणारे सर्व त्याला नमन करितील,
ज्यांला आपला जीव वांचवितां येत नाहीं तेहि नमतील.
३० त्यांचे वंशजहि त्याची सेवा करितील;
पुढल्या पिढीच्या लोकांस प्रभूविषयीं कथन करितील.
३१ तेहि येऊन भावी पिढीला त्याचें न्यायत्व कळवितील.
त्यानेंच हें सिद्धीस नेलें असें म्हणतील.

## २३ [दाविदाचें स्तोत्र]

१ परमेश्वर माझा मेंढपाळ आहे;
मला कांहीं उणें पडणार नाहीं.
२ तो मला हिरव्याचार कुरणांत बसवितो;
तो मला शांत पाण्याजवळ नेतो.
३ तो माझा जीव ताजातवाना करितो;
तो आपल्या नामास्तव मला नीतिमार्गांनीं चालवितो.
४ मृत्युच्छायेच्या दरींतूनहि मी जात असलों तरी अरिष्टास भिणार नाहीं,
कारण तूं मजबरोबर आहेस;
तुझी आंकडी व तुझी काठी मला धीर देतात.
५ तूं माझ्या शत्रूंच्या देखत मजपुढें ताट वाढितोस;
तूं माझ्या डोक्याला तेलाचा अभ्यंग करितोस;

माझें पात्र कांठोकांठ भरलें आहे.
६ खरोखर माझ्या आयुष्याचे सर्व दिवस मला कल्याण व दया हीं लाभतील;
आणि परमेश्वराच्या घरांत मी चिरकाल राहीन.

## २४

[ दाविदाचें स्तोत्र ]

१ पृथ्वी व तीवरील सर्व कांहीं परमेश्वराचें आहे;
जग व त्यांत राहणारे परमेश्वराचे आहेत.
२ कारण त्यानेंच सागरावर तिचा पाया घातला,
त्यानेंच जलप्रवाहांवर तिला स्थिर केलें.
३ परमेश्वराच्या गिरीवर कोण चढेल ?
त्याच्या पवित्र स्थानांत कोण उभा राहील ?
४ ज्याचे हात स्वच्छ आणि मन शुद्ध आहे,
जो आपलें चित्त असत्याकडे लावीत नाहीं,
व कपटानें शपथ वाहत नाहीं तो.
५ त्याला परमेश्वरापासून आशीर्वाद मिळेल,
आपल्या उद्धारक देवाच्या हातून तो धार्मिक ठरेल.
६ त्याला शरण जाणारे हेच लोक होत;
हे याकोबाच्या देवा, तुझ्या दर्शनासाठीं उत्सुक असलेले हेच लोक होत. [ सेला ]

७ अहो वेशींनो, उन्नत व्हा;
पुरातन द्वारांनो, उंच व्हा;
म्हणजे प्रतापशाली राजा आंत येईल.
८ हा प्रतापशाली राजा कोण ?
बलवान् व पराक्रमी परमेश्वर,
युद्धांत पराक्रमी परमेश्वर तोच.
९ अहो वेशींनो, उन्नत व्हा;
पुरातन द्वारांनो, उंच व्हा;
म्हणजे प्रतापशाली राजा आंत येईल.
१० हा प्रतापशाली राजा कोण ?
सेनाधीश परमेश्वर,
हाच प्रतापशाली राजा. [ सेला ]

## २५

[ दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, तुजकडे मी आपलें चित्त लावितों.
२ हे देवा, तुजवर माझी श्रद्धा आहे;
माझी फजिती होऊं देऊं नको;
माझ्या वैऱ्यांना मजवर विजयी होऊं देऊं नको.
३ तुझी कास धरणारा कोणीच फजीत होत नाहीं;
निष्कारण कपट करणारे फजीत होतात.
४ हे परमेश्वरा, तुझ्या वाटा मला दाखीव;
तुझे मार्ग मला प्रगट कर.
५ तूं आपल्या सत्यपथानें मला ने, मला शिक्षण दे,
कारण तूं माझा उद्धारक देव आहेस;
मी तुझी नित्य प्रतीक्षा करितों.
६ हे परमेश्वरा, तूं आपला कळवळा व वात्सल्य हीं आठीव;
तीं पुरातन काळापासून आहेत.
७ हे परमेश्वरा, माझीं तारुण्यांतलीं पातकें व माझे अपराध आठवूं नको;
तूं आपल्या वात्सल्यानुसार माझें स्मरण कर.
८ परमेश्वर श्रेष्ठ व सरळ आहे,
म्हणून तो पाप्यांस सन्मार्ग दाखवितो.
९ तो नम्र जनांस न्यायपथाला लावितो;
तो दीनांस आपला मार्ग शिकवितो.
१० परमेश्वराचा करार व त्याचे विधि पाळणाऱ्यांस त्याचे सर्व मार्ग वात्सल्यमय व सत्यपूर्ण आहेत.
११ हे परमेश्वरा, तूं आपल्या नामासाठीं माझ्या दुष्टाईची क्षमा कर;
ती फार झाली आहे.
१२ परमेश्वराचें भय धरणारा असा मनुष्य कोण ?
त्यानें जो मार्ग धरावा त्याविषयींचें शिक्षण तो त्याला देईल.
१३ त्याचा जीव सुखासमाधानानें राहील;
त्याचा वंश पृथ्वीचें वतन पावेल.
१४ परमेश्वराचें सख्य त्याचें भय धरणाऱ्यांबरोबर असतें;

तो आपला करार त्यांस कळवील.
१५ माझे नेत्र परमेश्वराकडे नित्य लागले आहेत;
तो माझे पाय जाळ्यांतून सोडवील.
१६ मजकडे वळून मला प्रसन्न हो;
कारण मी निराश्रित व दीन आहें.
१७ माझ्या मनावरचें दडपण काढ;
माझ्या संकटांतून मला सोडीव.
१८ माझी दैन्यावस्था व माझे कष्ट पाहा;
माझ्या सर्व पापांची क्षमा कर.
१९ माझे वैरी पाहा, ते बहुत झाले आहेत;
ते अत्यंत कठोरपणें माझा द्वेष करितात.
२० माझ्या जिवाचें रक्षण कर;
मला मुक्त कर;
मी तुझा आश्रय धरिला आहे म्हणून माझी फजिती होऊं देऊं नको.
२१ सात्विकपण व सरळपण माझें संरक्षण करोत;
कारण मी तुझी प्रतीक्षा करीत आहें.
२२ हे देवा, इस्राएलास त्याच्या सर्व संकटांतून सोडीव.

## २६

[ दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, माझा न्याय कर, कारण मी सात्विकपणें वागलों आहें;
आणि परमेश्वरावर अढळ भाव ठेविला आहे.
२ हे परमेश्वरा, मला कसास लाव, माझी परीक्षा कर;
माझें अंतर्याम व माझें हृदय पडताळून पाहा.
३ तुझें वात्सल्य माझ्या दृष्टीपुढें आहे;
तुझ्या सत्यमार्गानें मी चाललों आहें.
४ अधम लोकांत मी बसलों नाहीं;
कपटी लोकांची संगत मी धरणार नाहीं.
५ दुष्कर्म्यांच्या जनसभेचा मी द्वेष करितों;
दुर्जनांबरोबर मी बसणार नाहीं.
६ हे परमेश्वरा, मी निर्दोषतेनें आपले हात धुईन
तेव्हां तुझ्या वेदीला फेरा घालीन;
७ म्हणजे मला तुझें उपकारस्मरण प्रकट करावयास
व तुझीं सर्व आश्चर्यकर्में वर्णावयास सांपडेल.
८ हे परमेश्वरा, तुझ्या मंदिराचें स्थान,
तुझ्या गौरवाचें निवासस्थान हीं मला प्रिय आहेत.
९ पातक्यांबरोबर माझा जीव,
घातकी मनुष्यांबरोबर माझा प्राण काढून नेऊं नको;
१० त्यांचे हात उपद्रवानें,
त्यांचा उजवा हात लाचांनीं भरलेला आहे.
११ मी तर सात्विकपणें वागेन;
माझा उद्धार कर, मजवर दया कर.
१२ माझा पाय प्रशस्त स्थळीं स्थिर आहे;
जनसभांत मी परमेश्वराचा धन्यवाद करीन.

## २७

[ दाविदाचें स्तोत्र ]

१ परमेश्वर माझा प्रकाश व माझें तारण आहे;
मी कोणाची भीति बाळगूं?
परमेश्वर माझ्या जिवाचा दुर्ग आहे, मी कोणाचें भय धरूं?
२ माझे शत्रु व द्वेष्टे असे जे दुष्कर्मी
माझें मांस खाऊन टाकण्यास मजवर चढाई करून आले,
तेव्हां तेच ठेच खाऊन पडले.
३ सैन्यानें मजपुढें ठाणें दिलें तरी माझें हृदय कचरणार नाहीं;
मजवर युद्धप्रसंग ओढवला तरीहि मी हिम्मत धरून राहीन.
४ परमेश्वराजवळ मीं एक वरदान मागितलें, त्याच्या प्राप्तीसाठीं मी झटेन;
तें हें कीं माझ्या सर्व आयुष्यभर परमेश्वराच्या मंदिरीं माझी वस्ती व्हावी;
म्हणजे मी परमेश्वराचें मनोहर रूप पाहत राहीन
व त्याच्या पवित्र स्थानीं ध्यान करीन.
५ तो तर विपत्कालीं मला आपल्या मंडपांत लपवून ठेवील;
तो मला आपल्या डेऱ्याच्या गुप्त स्थळीं ठेवील;

तो मला खडकावर उचलून ठेवील.
६ आतां सभोंवतालच्या माझ्या वैऱ्यांवर माझें
मस्तक उन्नत होईल;
त्याच्या डेऱ्यांत मी उत्सवपूर्वक यज्ञ करीन;
मी गायन करीन, परमेश्वराचें गुणगान गाईन.
७ मी उच्चस्वरानें तुझा धावा करीत आहें, हे परमेश्वरा, ऐक;
मजवर दया कर, माझी याचना ऐक.
८ माझें दर्शन घ्या असें तूं म्हटलें
तेव्हां माझें हृदय तुला म्हणालें
हे परमेश्वरा, मी तुझ्या दर्शनाला
उत्सुक झालों आहें.
९ तूं आपलें मुख माझ्या दृष्टीआड करूं नको;
आपल्या सेवकाला रागानें दूर घालवूं नको;
तूं माझें साहाय्य होत आला आहेस;
हे माझ्या उद्धारक देवा, माझा त्याग करूं नको,
मला सोडूं नको.
१० माझ्या आईबापांनीं मला सोडिलें आहे
तरी परमेश्वर मला जवळ घेईल.
११ हे परमेश्वरा, आपला मार्ग मला दाखीव;
लोक माझ्या पाळतीवर बसले आहेत,
म्हणून मला चोपट मार्गानें ने.
१२ माझ्या शत्रूंच्या इच्छेवर मला सोपवूं नको,
कारण खोटे साक्षी व निष्ठुरपणाचे
फूत्कार टाकणारे
मजवर उठले आहेत.
१३ ह्या जीवलोकींच परमेश्वराची दया मजवर होईल
अशी जर माझी श्रद्धा नसती तर मग काय !
१४ परमेश्वराची प्रतीक्षा कर;
खंबीर हो, हिम्मत बांध; परमेश्वराचीच प्रतीक्षा कर.

## २८

[ दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, मी तुझा धावा करितों;
माझ्या दुर्गा, माझें न ऐकल्यासें करूं नको;
नाहीं तर तूं मजशीं मौन धरिल्यास
गर्तेंत पडणाऱ्यासारखी माझी गति होईल.
२ मी तुझा धावा करितों, तुझ्या पवित्र गाभाऱ्याकडे
हात वर करितों,
तेव्हां माझी दीनवाणी ऐक.
३ मनांत दगा असून आपल्या शेजाऱ्यांशीं स्नेहभावानें बोलणारे
असे दुर्जन व दुष्कर्मी यांच्याबरोबर मला ओढून
नेऊं नको.
४ त्यांच्या करणीप्रमाणें, त्यांच्या कर्मांच्या दुष्टतेप्रमाणें
त्यांच्या हातांच्या कृतीप्रमाणें, त्यांचें पारिपत्य कर;
त्यांच्या कर्मांचें फळ त्यांस दे.
५ परमेश्वराचीं कृत्यें, त्याच्या हातची कृति, ते
ध्यानांत आणीत नाहींत म्हणून तो त्यांस
फाडून टाकील,
उभारणार नाहीं.
६ परमेश्वर धन्यवादित असो,
कारण त्यानें माझी दीनवाणी ऐकली आहे.
७ परमेश्वर माझें सामर्थ्य व माझी ढाल आहे;
त्याजवर माझ्या हृदयानें भाव ठेविला आणि मी
साहाय्य पावलों;
म्हणून माझें हृदय उल्लासतें;
मी गीत गाऊन त्याचें स्तवन करीन.
८ परमेश्वर त्यांचें सामर्थ्य आहे,
तोच आपल्या अभिषिक्ताचा तारणदुर्ग आहे.
९ तूं आपल्या लोकांस तार, आपल्या वतनाला
आशीर्वाद दे;
त्यांचा प्रतिपाळ कर, त्यांस सदोदित वाहून ने.

## २९

[ दाविदाचें स्तोत्र ]

१ अहो दिव्यदूतांहो, परमेश्वराला श्रेय द्या,
परमेश्वराला गौरव व सामर्थ्य यांचें श्रेय द्या.
२ परमेश्वराला त्याच्या वैभवी नामाचें श्रेय द्या;
पावित्र्यानें युक्त होऊन त्याची आराधना करा.
३ परमेश्वराचा ध्वनि जलांमधून चढत आहे;

१ मुळांत : देवाचे पुत्र अथवा समर्थांचे पुत्र.

तेजपूर्ण देव गर्जना करीत आहे;
परमेश्वर जलाशयांवर आहे.
४ परमेश्वराचा ध्वनि प्रबल आहे;
परमेश्वराचा ध्वनि प्रतापमय आहे.
५ परमेश्वराचा ध्वनि देवदारु मोडितो;
परमेश्वर लबानोनाच्या देवदारूंचा चकाचूर करतो.
६ तो त्यांस वासराप्रमाणें उसळावयास लावितो;
लबानोन व सिर्योन यांस गव्याच्या वत्साप्रमाणें उसळावयास लावितो.
७ परमेश्वराचा ध्वनि अग्निज्वाला भेदितो.
८ परमेश्वराचा ध्वनि वनें कंपायमान करितो;
परमेश्वर कादेशाचें वन कंपित करितो.
९ परमेश्वराचा ध्वनि हरिणींस गर्भ गाळावयास लावितो
आणि वनवृक्ष बोडके करितो;
त्याच्या मंदिरांत सर्वत्र महिमा! महिमा!
असा ध्वनि दुमदुमतो.
१० परमेश्वर जलप्रलयावर आरूढ होतो;
परमेश्वर राजासनावर सर्वकाळ बसलेला आहे.
११ परमेश्वर आपल्या लोकांस सामर्थ्य देईल;
परमेश्वर आपल्या लोकांस शांतीचें वरदान देईल.

## ३०

[ गृहप्रवेशाच्या वेळीं गावयाचें दाविदाचें संगीत स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, मी तुझी थोरवी गाईन, कारण तूं मला उद्धरिलें आहे;
तूं माझ्या वैऱ्यांस मजवर हर्ष दिलें नाहीं.
२ हे परमेश्वरा, माझ्या देवा,
मीं तुझा धावा केला आणि तूं मला रोगमुक्त केलें.
३ हे परमेश्वरा, तूं माझा जीव अधोलोकांतून वर काढिला;
तूं मला जिवंत राखिलें, मला गर्तेंत पडूं दिलें नाहीं.
४ अहो परमेश्वराचे भक्तहो, त्याचें गुणगान गा;
आणि त्याच्या पवित्र नामाचें स्मरण करितांना धन्यवाद करा.
५ त्याचा क्रोध क्षणमात्र राहतो;
त्याचा प्रसाद आयुष्यभर राहतो;
रात्रीं विलापानें बिऱ्हाड केलें
तरी प्रातःकाळीं हर्षध्वनि होतो.
६ मीं तर आपल्या संपत्कालीं म्हटलें,
मी कधीं ढळणार नाहीं.
७ हे परमेश्वरा, तूं प्रसन्न होऊन माझा पर्वत खंबीर केला;
तूं आपलें मुख लपविलें तोंच मी भयभीत झालों.
८ हे परमेश्वरा, मीं तुझा धावा केला;
परमेश्वराची विनवणी करून मी म्हणालों :
९ माझा रक्तपात झाल्यानें, मी गर्तेंत पडल्यानें काय लाभ?
माती तुझी स्तुति करील काय? ती तुझें सत्य विदित करील काय?
१० हे परमेश्वरा, ऐक, मजवर दया कर;
हे परमेश्वरा, माझें साहाय्य कर.
११ तूं माझा विलाप दूर करून मला नाचावयास लाविलें आहे;
तूं माझें गोणताट काढून मला हर्षाचा कटिबंध नेसविला आहे;
१२ यासाठीं कीं माझ्या आत्म्यानें
तुझें गुणगान गावें, गप्प राहूं नये;
हे परमेश्वरा, माझ्या देवा, मी सर्वकाळ तुझें उपकारस्मरण करीन.

## ३१

[ मुख्य गवयासाठीं; दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, मीं तुझा आश्रय धरिला आहे;
मला कधीं लज्जित होऊं देऊं नको;
तूं आपल्या न्यायानें मला मुक्त कर.
२ मजकडे आपला कान लाव;
मला सत्वर सोडीव;
तूं माझा प्रबळ दुर्ग हो;

१ उत्पत्ति ६:१७ पाहा.

माझ्या बचावासाठीं आश्रयस्थान हो.
३ कारण माझा दुर्ग, व माझा गड तूं आहेस;
तूं आपल्या नामास्तव मला हातीं धरून चालीव.
४ त्यांनीं मजसाठीं चोरून मांडिलेल्या जाळ्यांतून तूं मला सोडीव,
कारण तूं माझा आश्रय आहेस.
५ तुझ्या हातीं मी आपला आत्मा सोपवितों;
हे परमेश्वरा, सत्यस्वरूप देवा,
तूं मला उद्धरिलें आहे.
६ निरर्थक मूर्तींला भजणाऱ्यांचा मी द्वेष करितों;
माझा भाव तर परमेश्वरावर आहे.
७ मी तुझ्या प्रसादानें उल्लास व हर्ष पावेन;
कारण तूं माझी दैन्यावस्था पाहिली आहे;
माझ्या जिवावरलीं संकटें तुला अवगत आहेत.
८ तूं मला वैऱ्याच्या कोंडींत सांपडूं दिलें नाहीं;
माझे पाय तूं प्रशस्त स्थळीं स्थिर केले.
९ हे परमेश्वरा, मजवर कृपा कर,
कारण मी संकटांत आहें;
माझे नेत्र, माझा जीव व माझें शरीर हीं दुःखानें क्षीण झालीं आहेत.
१० माझें आयुष्य शोकांत, माझीं वर्षें उसासे टाकण्यांत गेलीं आहेत;
माझ्या दुष्टाईनें माझी शक्ति क्षीण झाली आहे,
माझीं हाडें जीर्ण झालीं आहेत.
११ माझ्या सर्व शत्रूंमुळें माझी निंदा [illegible] आहे;
माझ्या शेजाऱ्यांपाजाऱ्यांत मा[illegible] फार निर्भर्त्सना होत आहे;
माझ्या ओळखीपाळखीच्या लोकांस माझें भय वाटत आहे;
मला रस्त्यांत पाहून लोक पळून जातात.
१२ स्मरणांतून गेलेल्या मृतासारखा माझा विसर पडला आहे;
फुटक्या भांड्यासारखा मी झालों आहें.
१३ कारण बहुतांच्या तोंडून माझी बेअब्रू झालेली मीं ऐकली आहे;
पाहावें तिकडे भ्रांतिच!
मजविरुद्ध मनसुबा करून
त्यांनीं माझा जीव घेण्याची योजना केली.
१४ हे परमेश्वरा, मीं तर तुजवर भाव ठेविला आहे;
मी म्हणतों, तूंच माझा देव आहेस.
१५ माझे दिवस तुझ्या हातीं आहेत;
माझ्या वैऱ्यांच्या हातांतून, माझ्या पाठीस लागणाऱ्यांपासून मला सोडीव.
१६ तूं आपल्या सेवकावर आपला मुखप्रकाश पाड;
तूं आपल्या वात्सल्यानें मला तार.
१७ हे परमेश्वरा, मला लज्जित होऊं देऊं नको;
कारण मीं तुझा धावा केला आहे;
दुर्जन लज्जित होवोत, ते अधोलोकांत निःशब्द राहोत.
१८ धार्मिकाविरुद्ध गर्वानें, तिरस्कारानें व उद्दामपणानें बोलणाऱ्यांची वाचा बंद पडो.
१९ तुझें चांगुलपण किती थोर आहे!
तुझें भय धरणाऱ्यांकरितां तूं तें सांठवून ठेविलें आहे,
तुझा आश्रय करणाऱ्यांसाठीं मनुष्यमात्रांदेखत तूं तें सिद्ध केलें आहे.
२० तूं आपल्या समक्षतेच्या गुप्त स्थलीं मनुष्यांच्या कलहांपासून त्यांस लपवितोस;
शब्दकलहापासून त्यांस आपल्या मंडपांत रक्षितोस.
२१ परमेश्वर धन्यवादित असो;
त्यानें मला तटबंदीच्या शहरांत ठेवून आपल्या वात्सल्याचें कौतुक दाखविलें आहे.
२२ मी तर अधीर होऊन म्हणालों,
मी तुझ्या दृष्टीपुढून दूर झालों आहें;
तरी मीं तुझा धावा केला तेव्हां तूं माझ्या विनवणीचा शब्द ऐकला.
२३ अहो परमेश्वराचे सर्व भक्तहो, तुम्ही त्याजवर प्रेम करा;
परमेश्वर सत्यशीलांचें रक्षण करितो;
गर्विष्ठाचें पुरें पारिपत्य करितो.

२४ अहो परमेश्वराची आशा धरणारे,
तुम्ही सर्व हिम्मत बांधा, तुमचें मन वीर करो.

## ३२ [ दाविदाचें मास्कील (ध्यानपर) स्तोत्र ]

१ ज्याच्या अपराधाची क्षमा झाली आहे,
ज्याच्या पापावर पांघरूण घातलें आहे, तो धन्य !
२ ज्याच्या हिशेबीं परमेश्वर अधर्माचा दोष लावीत नाहीं
व ज्याच्या मनांत कपट नाही,
तो मनुष्य धन्य !
३ मी गप्प राहिलों होतों,
तेव्हां सतत कण्हण्यामुळें माझीं हाडें जीर्ण झालीं;
४ कारण रात्रंदिवस तुझ्या हाताचा भार मजवर होता;
उन्हाळ्याच्या तापानें माझ्यांतलें पाणी सुकून गेलें. [ सेला ]
५ मीं आपलें पाप तुजजवळ कबूल केलें;
आपला अधर्म मीं लपवून ठेविला नाही;
मीं आपले अपराध परमेश्वराजवळ कबूल करीन असें मी म्हणालों,
तेव्हां तूं मला माझ्या पापदोषाची क्षमा केली. [ सेला ]
६ यास्तव तूं पावशील त्या वेळीं प्रत्येक भक्तानें तुझी प्रार्थना करावी;
जलांचा महापूर आला तरी त्याला त्याचा स्पर्श होणार नाहीं.
७ तूं माझें आश्रयस्थान आहेस, तूं संकटापासून माझें रक्षण करिशील;
मुक्ततेच्या स्तोत्रांनीं तूं मला वेढिशील. [ सेला ]
८ मी तुला बोध करीन; ज्या मार्गानें तुला गेलें पाहिजे
त्याचें शिक्षण तुला देईन;
मी आपली दृष्टि तुजवर ठेवून तुला बुद्धिवाद सांगेन.
९ निर्बुद्ध घोडा किंवा खेचर यासारखें होऊं नका;
त्याला आकळण्यासाठीं लगाम व वागदोर अशी सामग्री पाहिजे,
नसली तर तीं तुझ्याजवळ यावयाचीं नाहींत.
१० दुर्जनाला पुष्कळ दुःखें भोगावीं लागतात;
परमेश्वरावर भाव ठेवणाऱ्याभोवतें दयेचें वेष्टन असतें.
११ अहो धार्मिकहो, परमेश्वराच्या ठायीं आनंदोत्सव करा;
अहो सरळ मनाचे जनहो, तुम्ही सर्व आनंदाचा गजर करा.

## ३३

१ अहो धार्मिकहो, परमेश्वराचा जयजयकार करा;
सरळांस स्तुतिगान शोभतें.
२ वीणेवर परमेश्वराचें उपकारस्मरण करा;
दशतंतु वाद्यावर त्याचें गुणगान गा.
३ त्यापुढें नवें गीत गा;
जयघोष करीत कुशलतेनें वाद्यें वाजवा;
४ कारण परमेश्वराचें वचन सरळ आहे;
त्याची सर्व कृति सत्याची आहे.
५ त्याला नीति व न्याय हीं प्रिय आहेत;
परमेश्वराच्या वात्सल्यानें पृथ्वी भरली आहे.
६ परमेश्वराच्या शब्दानें आकाश निर्माण झालें;
त्याच्या मुखश्वासानें आकाशांतील सर्व सैन्य निर्माण झालें.
७ तो समुद्राचीं जलें राशीसारखीं एकवट करितो;
महासागरांचे निधि सांठवितो.
८ अखिल पृथ्वी परमेश्वराचें भय धरो;
जगांत राहणारे सर्व त्याचा धाक बाळगोत.
९ तो बोलला आणि अवघें झालें;
त्यानें आज्ञा केली आणि सर्व कांहीं स्थिर झालें.
१० राष्ट्रांच्या मसलती परमेश्वर निरर्थक करितो;
लोकांचे संकल्प निष्फळ करितो.
११ परमेश्वराची योजना सर्वकाळ टिकते;

त्याच्या मनांतील संकल्प पिढ्यानपिढ्या कायम राहतात.
१२ ज्या राष्ट्राचा देव परमेश्वर आहे,
ज्या लोकांस त्यानें आपल्या वतनाकरितां प्रजा म्हणून निवडिलें आहे,
ते धन्य !
१३ परमेश्वर आकाशांतून पाहतो;
सर्व मानवजातीला तो निरखितो.
१४ तो आपल्या निवासस्थानांतून
पृथ्वीवर राहणाऱ्या सर्वांना न्याहाळून पाहतो.
१५ त्या सर्वांचीं हृदयें घडणारा
व त्यांचीं सर्व कामें जाणणारा तो आहे.
१६ कोणीहि राजा मोठ्या सैन्यबलानें जय पावतो असें नाहीं;
वीरपुरुष आपल्या पराक्रमानें निभावतो असें नाहीं.
१७ जयप्राप्तीसाठीं घोडा केवळ व्यर्थ होय;
त्याला आपल्या महाबलानें कोणाचा बचाव करितां येणार नाहीं.
१८ पाहा, जे परमेश्वराचें भय धरितात
व त्याच्या दयेची अपेक्षा करितात,
१९ त्यांचा जीव मृत्युपासून सोडवावा
व दुष्काळांत त्यांचा प्राण वांचवावा
म्हणून त्यांजवर त्याची नजर असते.
२० आमचा आत्मा परमेश्वराची प्रतीक्षा करीत आहे;
आमचें साह्य व ढाल तोच आहे.
२१ त्याच्या ठायीं आमच्या हृदयाला आनंद आहे,
कारण त्याच्या पवित्र नामावर आमची श्रद्धा आहे.
२२ हे परमेश्वरा, आम्हीं तुझी आशा धरिली आहे
म्हणून आम्हांवर तुझा प्रसाद असो.

# ३४

[दाविदाचें स्तोत्र; त्यानें अबीमलेखासमोर बुद्धिभ्रंश झाल्याचें मिष केल्यावर त्याला हाकून लावण्यांत आलें आणि तो निघून गेला तेव्हांचें.]

१ परमेश्वराचा धन्यवाद मी सर्वदा करीन;
माझ्या मुखांत त्याचें स्तवन सतत असेल.
२ माझा जीव परमेश्वराच्या ठायीं प्रतिष्ठा मिरवील;
दीन हें ऐकून हर्ष करितील.
३ तुम्ही मजबरोबर परमेश्वराची थोरवी गा;
आपण सर्व मिळून त्याच्या नामाची महती वर्णूं या.
४ मी परमेश्वराला शरण गेलों आणि तो मला पावला;
त्यानें माझ्या सर्व भयांपासून मला सोडविलें.
५ ज्यांनीं त्याजकडे पाहिलें ते प्रकाश पावले;
त्यांचीं मुखें लज्जेनें कदापि काळवंडणार नाहींत.
६ या पामरानें धावा केला आणि परमेश्वरानें तो ऐकला;
त्यानें त्याच्या सर्व संकटांतून त्याला सोडविलें.
७ परमेश्वराचा दिव्यदूत त्याचें भय धरणाऱ्यांसभोंवतीं छावणी देतो
आणि त्यांचें संरक्षण करितो.
८ परमेश्वर किती चांगला आहे याचा अनुभव घेऊन पाहा;
त्याजवर भाव ठेवितो तो पुरुष धन्य !
९ परमेश्वराचे पवित्र जनहो, त्याचें भय धरा,
कारण त्याचें भय धरणाऱ्यांस कांहीं उणें पडत नाहीं.
१० तरुण सिंहांसहि वाण पडते व त्यांची उपासमार होते;
पण परमेश्वराला शरण जाणाऱ्यांस कोणत्याहि चांगल्या वस्तूची वाण पडत नाहीं.
११ मुलांनो, या, माझें ऐका;
मी तुम्हांस परमेश्वराचें भय धरावयास शिकवीन.
१२ सुख भोगावें म्हणून जीविताची इच्छा धरणारा
व दीर्घायुष्य चाहणारा असा मनुष्य कोण ?
१३ तूं आपली जिव्हा दुर्भाषणापासून
व आपले ओठ कपटी भाषणापासून आवर.
१४ वाईटाचा त्याग कर व बरें तें कर;
शांतिप्राप्त्यर्थ यत्न कर व तिचें अवलंबन कर.
१५ परमेश्वराचे नेत्र धार्मिकांकडे असतात;
त्याचे कान त्यांच्या हाकेकडे असतात.
१६ वाईट करणाऱ्यांची आठवण पृथ्वीवरून राहूं नये म्हणून
परमेश्वर त्यांस विमुख होतो.

१७ धार्मिक धावा करितात,
तो ऐकून परमेश्वर त्यांना त्यांच्या सर्व संकटांपासून
मुक्त करितो.
१८ परमेश्वर भग्नहृदयी लोकांच्या सन्निध असतो;
अनुतप्त मनाच्या लोकांस तो उद्धरितो.
१९ धार्मिकाला बहुत कष्ट होतात;
तरी परमेश्वर त्या सर्वांतून त्याला सोडवितो.
२० त्याचें हाड न हाड तो संभाळितो;
त्यांतलें एकहि मोडत नाहीं.
२१ दुष्टाचें मरण दुष्टाईतच होणार;
धार्मिकाचे द्वेष्टे दंड पावतात.
२२ परमेश्वर आपल्या सेवकांचा जीव उद्धरितो;
त्याचा आश्रय धरणारा कोणीहि दोषपात्र होत
नाहीं.

## ३५ [ दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, माझा विरोध करणाऱ्यांबरोबर विरोध
कर;
मजबरोबर लढणाऱ्यांशीं लढ.
२ ढाल व कवच धारण कर,
माझ्या साहाय्यासाठीं उभा राहा.
३ भाला हातीं घे, माझा पाठलाग करणाऱ्यांचा
मार्ग अडीव;
माझ्या जिवाला म्हण कीं मीच तुझें तारण आहें.
४ माझा जीव घेऊं पाहणारे लज्जित व फजीत
होवोत;
माझें नुकसान व्हावें म्हणून मनसुबा करणारे
मागें हटोत व लाज पावोत.
५ ते वाऱ्यापुढें उडणाऱ्या भुसासारखे होवोत,
परमेश्वराचा दिव्यदूत त्यांस उधळून लावो.
६ त्यांचा मार्ग अंधकारमय व निसरडा होवो,
परमेश्वराचा दिव्यदूत त्यांच्या पाठीस लागो.
७ कारण त्यांनीं विनाकारण माझ्यासाठीं आपला
फासा चोरून मांडिला,
माझ्या जिवासाठीं विनाकारण खाचहि खणिली.
८ त्याजवर नकळत आपत्ति येवो;
जो फांसा त्यानें चोरून मांडिला त्यांत तोच
गुंतून पडो;
तो त्यांत अचानक नाश पावो.
९ मग माझा जीव परमेश्वराच्या ठायीं उल्लास पावेल;
त्यानें सिद्ध केलेल्या तारणामुळें हर्ष करील.
१० माझीं सर्व हाडें म्हणतील, हे परमेश्वरा, तुज-
सारखा कोण आहे?
तूं दीनास त्याच्याहून जो बलिष्ठ त्याजपासून
सोडवितोस;
तूं दीनांस व कंगालांस लुटणाऱ्यापासून
सोडवितोस;
११ द्रोह करणारे साक्षी पुढें येतात
आणि जें मला ठाऊक नाहीं त्याविषयीं मला
विचारितात.
१२ मीं केलेल्या बऱ्याची फेड ते वाईटानें करितात,
माझ्या जिवाला सारे अंतरले आहेत.
१३ ते आजारी असतां मी तर गोणताट नेसत असें;
मी उपास करून आपल्या जिवाला क्लेश देत असें;
माझी प्रार्थना माझ्या पदरीं परत आली.
१४ तो जसा काय माझा मित्र, माझा भाऊ आहे
असें समजून मी त्याजशीं वागलों;
आईसाठीं शोक करणाऱ्यासारखा सुतकी चेहरा-
वानें मी मान खालीं घालून हिंडलों.
१५ मी लंगडलों तेव्हां त्यांना आनंद झाला;
ते एकत्र जमले, ते अधम मला नकळत मज-
विरुद्ध एकत्र जमले;
त्यांनीं माझी निंदा एकसारखी चालविली.
१६ तुकड्यासाठीं मस्करी करणाऱ्या अधर्म्यांप्रमाणें
त्यांनीं मजवर दांत करकर चावले.
१७ हे प्रभु, कोठवर पाहत राहशील?
त्यांनीं योजिलेल्या अरिष्टांपासून माझा जीव,
तरुण सिंहांपासून माझा प्राण सोडीव.
१८ महासभेंत मी तुझें उपकारस्मरण करीन;
बलिष्ठ लोकांमध्यें मी तुझें स्तवन करीन.

१९ माझे वैरी मजविषयीं खोडसाळपणानें हर्ष न करोत;
माझा विनाकारण द्वेष करणारे डोळे न मिचकावोत;
२० कारण त्यांचें बोलणें सलोख्याचें नाहीं;
देशांत शांततेनें राहणाऱ्यांविरुद्ध ते मसलती करितात.
२१ माझ्यापुढें तोंड विचकून ते म्हणाले,
अहाहा ! अहाहा ! आम्हीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलें आहे.
२२ हे परमेश्वरा, तूंहि पाहिलें आहेस, उगा राहूं नको;
हे प्रभू, मजपासून दूर राहूं नको.
२३ हे माझ्या देवा, हे माझ्या प्रभू, माझा न्यायनिवाडा,
माझा वाद करावा म्हणून उठ, जागृत हो.
२४ हे परमेश्वरा, माझ्या देवा, आपल्या नीतीनें
माझा न्यायनिवाडा कर;
ते मजविरुद्ध हर्ष न करोत.
२५ अहाहा ! आमच्या मनासारखें झालें असें ते आपल्या मनांत न म्हणोत;
आम्हीं त्याला गिळून टाकिलें असें ते न म्हणोत.
२६ माझ्या अहितामुळें आनंद करणारे सर्व एकदम लज्जित व फजीत होवोत;
मजवर तोरा मिरविणारे लज्जा व फजिती यांनीं व्याप्त होवोत.
२७ माझ्या न्याय्य पक्षाला अनुकूल असणारे उत्साह व हर्ष पावोत;
आपल्या भक्ताच्या कल्याणानें आनंद पावणाऱ्या परमेश्वराचा गौरव होवो, असें ते सतत म्हणोत.
२८ माझी जिव्हा तुझ्या न्यायपरायणतेविषयीं गुणगुणत राहील
व तुझें सतत स्तवन करील.

## ३६

[ मुख्य गवयासाठीं; परमेश्वराचा सेवक दावीद याचें स्तोत्र ]

१ दुर्जनाच्या मनांतून अधर्माचा ध्वनि निघत असतो;
त्याच्या डोळ्यांपुढें देवाचें भय नाहीं.
२ आपलें पाप उघडकीस येणार नाहीं, त्याचा कोण तिटकारा करणार नाहीं,
अशी तो आपल्या मनाची समजूत करून घेतो.
३ त्याच्या तोंडचे शब्द अधर्माचे व कपटाचे असतात;
त्यानें सुबुद्धि व सद्वर्तन हीं टाकून दिलीं आहेत.
४ तो अंथरुणावर पडल्यापडल्या अधर्माच्या मसलती करितो; तो कुमार्ग धरून राहतो,
वाइटाचा वीट मानीत नाहीं.
५ हे परमेश्वरा, तुझें वात्सल्य आकाशापर्यंत पोहंचलें आहे;
तुझें सत्य गगनाला जाऊन भिडलें आहे.
६ तुझी नीति देवाच्या पर्वतांसारखी आहे;
तुझे निर्णय गंभीर महासागरासारखे आहेत;
हे परमेश्वरा, तूं मनुष्य व पशु यांचा प्रतिपाळ करितोस.
७ हे देवा, तुझें वात्सल्य किती अमोल आहे !
मानवजाति तुझ्या पंखांच्या छायेचा आश्रय करिते !
८ तुझ्या मंदिरांतील समृद्धींतून त्यांस तृप्ति होईल,
आणि तूं आपल्या आनंदनदींतून त्यांस पाजिशील.
९ कारण जीवनाचा झरा तुजजवळ आहे;
तुझ्या प्रकाशानें आम्हीं प्रकाश पाहतों.
१० तुला ओळखणाऱ्यांस तुझें वात्सल्य,
सरळ मनाच्यांस तुझा न्याय लाभूं दे.
११ गर्विष्ठाचा पाय मला न तुडवो;
दुर्जनांचा हात मला हाकून न लावो.
१२ पाहा, दुष्कर्मी कसे पडले आहेत !
त्यांना लोटून दिलें आहे, त्यांच्यानें उठवणार नाहीं.

## ३७

[ दाविदाचें स्तोत्र ]

१ दुष्कर्म्यांवर जळफळूं नको;
अधर्म करणाऱ्यांचा हेवा करूं नको.
२ कारण ते गवताप्रमाणें लवकर कापले जातात,
हिरवळीसारखे वाळून जातात.

३ परमेश्वरावर भाव ठेव व सदाचारानें वाग;
देशांत वस्ती करून राहा, सत्याचें अवलंबन कर;
४ म्हणजे परमेश्वराच्या ठायीं तुला आनंद होईल;
तो तुझे मनोरथ पूर्ण करील.
५ आपला जीवितक्रम परमेश्वराकडे सोपवून दे;
त्याजवर भाव ठेव म्हणजे तो तुझी
कार्यसिद्धि करील.
६ तो तुझी धार्मिकता प्रकाशासारखी,
तुझें न्यायत्व मध्यान्हासारखें प्रगट करील.
७ परमेश्वराच्या अधीन होऊन स्वस्थ राहा;
त्याची प्रतीक्षा शांतपणें करून राहा;
जो मनुष्य आपल्या मार्गानें उत्कर्ष पावतो,
जो मनुष्य दुष्ट संकल्प सिद्धीस नेतो त्याजवर
जळफळूं नको.
८ राग सोडून दे, क्रोधाविष्टपणाचा त्याग कर;
जळफळूं नको, अशानें दुष्कर्माकडे प्रवृत्ति होते.
९ दुष्कर्म्यांचा उच्छेद होईल;
पण परमेश्वराची प्रतीक्षा करणारे पृथ्वीचें वतन
पावतील.
१० थोडक्याच अवधींत दुर्जन नाहींसा होईल;
तूं त्याचें ठिकाण शोधिशील पण त्याचा पत्ता
लागणार नाहीं;
११ दीन जन पृथ्वीचें वतन पावतील,
ते उदंड सुखाचा उपभोग घेतील.
१२ दुर्जन धार्मिकाविरुद्ध मसलती करितो,
त्याजवर दांतओठ खातो.
१३ प्रभु त्याला हसत आहे;
कारण त्याचा दिवस येत आहे हें
त्याला दिसतें.
१४ दीनदुबळ्यांस चीत करावयाला, सरळ मार्गानें
चालणाऱ्यांस वधावयाला,
दुर्जनांनी तरवार उपसली आहे व धनुष्य वाकवून
सज्ज केलें आहे.
१५ त्यांची तरवार त्यांच्याच उरांत शिरेल,
आणि त्यांचीं धनुष्यें भंग पावतील.
१६ धार्मिकाचें अल्प धन
बहुत दुर्जनांच्या विपुल धनापेक्षां उत्तम आहे.
१७ दुर्जनांचे भुज मोडतील;
पण धार्मिकांस परमेश्वर आधार असतो.
१८ सात्विकांच्या दिनचर्येकडे परमेश्वराचें लक्ष असतें;
त्यांचें वतन सर्वकाळ टिकेल.
१९ ते विपत्कालीं लज्जित होणार नाहींत;
दुष्काळाच्या दिवसांत तृप्त राहतील.
२० दुर्जन तर नाश पावतील;
परमेश्वराचे वैरी कुरणाच्या क्षणिक शोभेसारखे
होतील;
धुरासारखे नाहींतसे होऊन जातील.
२१ दुर्जन उसनें घेतो; परत करीत नाहीं;
धार्मिक उदारपणें वागतो व दान देतो.
२२ ज्यांस त्याचा आशीर्वाद प्राप्त होतो ते पृथ्वीचें
वतन पावतील;
ज्यांवर त्याचा शाप येईल त्यांचा उच्छेद होईल.
२३ परमेश्वर मनुष्याची गति स्थिर करितो,
आणि त्याचा आयुष्यक्रम त्याला प्रिय आहे.
२४ तो पडला तरी सपशेल पडणार नाहीं;
कारण परमेश्वर त्याला हात देऊन सावरील.
२५ मी तरुण होतों आणि आतां म्हातारा झालों,
तरी धार्मिक निराश्रित झालेला
व त्याची संतति भिकेस लागलेली मीं पाहिली नाहीं.
२६ तो नेहमीं उदार असतो, तो उसनें देतो;
त्याची संतति आशीर्वादित असते.
२७ वाइटापासून दूर राहा, बरें तें कर;
म्हणजे तुझी वस्ती कायमची राहील.
२८ कारण परमेश्वराला न्याय प्रिय आहे;
तो आपल्या भक्तांस सोडीत नाहीं;
त्यांचें रक्षण सर्वकाळ होतें;
पण दुर्जनांच्या संततीचा उच्छेद होतो.
२९ धार्मिक पृथ्वीचें वतन पावतील,
तींत ते सर्वदा वास करितील.
३० धार्मिकाचें मुख ज्ञान वदतें,

त्याची जिव्हा न्याय उच्चारिते.
३१ त्याच्या देवाचें नियमशास्त्र त्याच्या हृदयांत असतें;
त्याचीं पावलें घसरणार नाहींत.
३२ दुर्जन धार्मिकावर टपलेला असतो,
व त्याला जिवें मारावयास तो पाहत असतो.
३३ परमेश्वर त्याला त्याच्या हातीं देणार नाहीं,
त्याचा न्याय होईल तेव्हां तो त्याला दोषी ठरविणार नाहीं.
३४ परमेश्वराची प्रतीक्षा कर व त्याच्या मार्गाचें अवलंबन कर,
म्हणजे तो तुझी उन्नति करून
तुला पृथ्वीचें वतन देईल;
दुर्जनांचा उच्छेद झालेला तूं आपल्या डोळ्यांनी पाहशील.
३५ मीं एक उग्रस्वरूपी दुर्जन पाहिला,
तो हिरव्यागार वृक्षासारखा आपल्या जागी विस्तारलेला दिसला;
३६ पण मी तिकडून गेलों तों त्याचा मागमूस राहिला नव्हता;
मीं त्याचा शोध केला तरी तो सांपडला नाहीं.
३७ सात्विक मनुष्याकडे लक्ष दे, सरळ मनुष्याकडे पाहा;
शांतिप्रिय मनुष्याची वंशपरंपरा राहील.
३८ पातकी तर एकंदरीनें नष्ट होतील;
दुर्जनांचा वंश छेदिला जाईल;
३९ परंतु धार्मिकांचें तारण परमेश्वरापासून होतें;
संकटसमयीं तोच त्यांचा दुर्ग आहे.
४० परमेश्वर त्यांचें साहाय्य करितो व त्यांस मुक्त करितो;
त्यांस दुर्जनांपासून मुक्त करितो व तारितो,
कारण त्यांनीं त्याचा आश्रय धरिला आहे.

## ३८ [ स्मरण देण्याकरितां दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, तूं आपल्या क्रोधानें माझा निषेध करूं नको;
तूं संतापानें मला शिक्षा करूं नको.
२ तुझे बाण माझ्या देहांत खोल रुतले आहेत;
तुझ्या हाताच्या भारानें मी दबलों आहें.
३ तुझ्या कोपामुळें माझ्या अंगीं आरोग्य राहिलें नाहीं;
माझ्या पापामुळें माझ्या अस्थींत स्वस्थता नाहीं;
४ कारण माझे अपराध माझ्या डोक्यावरून गेले आहेत;
जड ओझ्याप्रमाणें ते मला फार भारी झाले आहेत.
५ माझ्या मूर्खपणामुळें
माझ्या जखमा सडून त्यांस घाण सुटली आहे.
६ माझ्या अंगाला आळेपिळे येतात, मी अगदीं वाकून गेलों आहें;
दिवसभर मी सुतक्याच्या वेषानें फिरतों.
७ माझ्या कंबरेंत दाह सुटला आहे;
माझ्या अंगीं आरोग्य अगदींच राहिलें नाहीं.
८ माझें अंग बधिर झालें आहे व फारच ठेचून गेलें आहे;
मी आपल्या हृदयांतील तळमळीमुळें ओरडत आहें.
९ हे प्रभू, माझी सर्व इच्छा तुला ठाऊक आहे;
माझें कण्हणें तुजपासून गुप्त नाहीं.
१० माझें काळीज धडधडतें; माझी शक्ति मला सोडून गेली आहे;
माझ्या डोळ्यांतलें तेजहि राहिलें नाहीं.
११ माझे प्रियजन व माझे मित्र माझी व्याधि पाहून दूर राहतात;
माझे जवळचे आप्तजन दूर उभे राहतात.
१२ माझा जीव घ्यावयास टपणारे मला धरण्यासाठीं फासे मांडितात;
माझें अनिष्ट चिंतिणारे अपकारक गोष्टी बोलतात,
ते दिवसभर कपटाच्या मसलती करीत राहतात.
१३ मी तर बहिऱ्यासारखा ऐकत नाहीं;
मुक्यासारखा मी आपलें तोंड उघडीत नाहीं.
१४ ज्या मनुष्याला ऐकूं येत नाहीं,
ज्याच्या मुखांतून प्रत्युत्तर निघत नाहीं,
त्याच्यासारखा मी झालों आहें.

१५ हे परमेश्वरा, मीं तुझी आशा धरिली आहे;
हे प्रभू, माझ्या देवा, तूं माझें ऐकशील.
१६ मी म्हणालों, तूं ऐकलें नाहीं तर ते मला पाहून हर्षतील;
माझा पाय घसरला म्हणजे ते माझ्यावर तोरा मिरवितील.
१७ मी पडण्याच्या लागास आलों आहें;
माझें दुःख मजसमोर नित्य आहे.
१८ मी आपला दोष पदरीं घेतों;
माझ्या पापामुळें मी खिन्न आहें.
१९ माझे वैरी जोमदार व पुष्कळ[1] आहेत;
खोडसाळपणानें माझा द्वेष करणारे बहुत झाले आहेत.
२० जें चांगलें आहे तें धरून मी चालतों,
म्हणून बऱ्याची फेड वाइटानें करणारे द्रोहानें माझा विरोध करितात.
२१ हे परमेश्वरा, मला सोडूं नको;
माझ्या देवा, मजपासून दूर राहूं नको.
२२ हे प्रभू, माझ्या उद्धारका,
माझें साहाय्य करण्याची त्वरा कर.

## ३९ [ मुख्य गवई यदूथून याच्यासाठीं; दाविदाचें स्तोत्र ]

१ मी म्हणालों कीं मीं आपल्या जिव्हेनें पाप करूं नये
म्हणून आपल्या चालचलणुकीस जपेन;
मजसमोर दुर्जन आहे तोंपर्यंत
मी आपल्या तोंडाला लगाम घालून ठेवीन.
२ मौन धरून मी गप्प राहिलों, बरेंवाईट कांहीं बोललों नाहीं,
तरी माझ्या दुःखानें उचल खाल्ली.
३ माझें हृदय आंतल्या आंत संतप्त झालें;
मला ध्यास लागला असतां मजमध्यें
अग्नि भडकला,
तेव्हां मी आपल्या जिव्हेनें बोललों:
४ हे परमेश्वरा, माझा अंतकाळ केव्हां, व माझें आयुष्यमान किती, हें मला समजूं दे;
मी किती नश्वर आहें हें मला कळूं दे.
५ पाहा, तूं माझे दिवस चौंगाभर केले आहेत;
माझ्या आयुष्याचा काळ तुजपुढें कांहीं नाहीं;
कोणी मनुष्य कितीहि खंबीर असला तरी तो श्वासरूपच होय, हें खास. [ सेला ]
६ मनुष्य छायेसारखा फिरतो,
तो उगीच धामधूम करितो, हें खास.
तो धन साठवितो, पण तें कोणाच्या हातीं लागेल हें त्याला ठाऊक नाहीं.
७ तर आतां हे प्रभू, मी कशाची अपेक्षा करूं ?
माझी आशा तुझ्याच ठायीं आहे.
८ माझ्या सर्व अपराधांपासून मला सोडीव;
मला मूर्खांच्या निंदेस पात्र करूं नको.
९ मी मुका झालों आहें, आपलें तोंड उघडीत नाहीं,
कारण हें तूंच केलें आहे.
१० तुझा प्रहार मजवरून दूर कर;
तुझ्या हाताच्या तडाख्यानें माझा क्षय होत आहे.
११ तूं मनुष्याला अधर्माबद्दल धमकावून शासन करितोस,
तेव्हां तूं त्याचें सौंदर्य पतंगाप्रमाणें विलयास नेतोस;
सर्व मनुष्यें श्वासवत् आहेत, हें खास.
१२ हे परमेश्वरा, माझी प्रार्थना ऐक;
माझ्या धाव्याकडे कान लाव;
माझे अश्रु पाहून उगा राहूं नको;
कारण मी आपल्या सर्व पूर्वजांप्रमाणें
तुजपुढें परदेशीय व उपरी आहें.
१३ मी येथून जाऊन नाहींसा होण्यापूर्वी मीं आनंदित व्हावें म्हणून मजवरून आपली क्रोधदृष्टि काढ.

## ४० [ मुख्य गवयासाठीं; दाविदाचें स्तोत्र ]

१ मीं धीर धरून परमेश्वराची वाट पाहिली
तेव्हां त्यानें मजकडे वळून माझा धावा ऐकला.
२ नाशाच्या खाचेंतून, दलदलीच्या चिखलांतून

१ अथवा: बलवान्.

त्यानें मला वर काढिलें,
माझे पाय खडकावर ठेविले आणि माझीं पावलें
स्थिर केलीं.
३ त्यानें माझ्या मुखांत नवें गीत,
आमच्या देवाचें स्तोत्र घातलें;
हें पाहून बहुत लोक भय धरितील
व परमेश्वरावर भाव ठेवितील.
४ जो पुरुष परमेश्वराला आपला भावविषय करितो,
आणि गर्विष्ठांच्या व असत्याकडे प्रवृत्ति असले-
ल्यांच्या वाऱ्यास उभा राहत नाहीं तो धन्य!
५ हे परमेश्वरा, माझ्या देवा, तूं आम्हांसाठीं केलेलीं
अद्भुतकृत्यें
व प्रगट केलेले आपले विचार बहुत आहेत;
तुझ्यासमोर त्यांची क्रमवार मांडणी करितां
येणार नाहीं;[1]
त्यांचें वर्णन करूं लागलों
तर ते माझ्या गणनेपलीकडे आहेत.
६ यज्ञपशु व अन्नार्पण यांत तुला संतोष नाहीं:
तूं माझे कान उघडिले आहेत;
होम व पापाबद्दल अर्पण हीं तूं मागत नाहींस.
७ यावरून मी म्हणालों, पाहा, मी आलों आहें;
ग्रंथपटांत मजविषयीं लिहून ठेविलें आहे कीं
८ हे माझ्या देवा, तुझ्या इच्छेप्रमाणें करण्यांत मला
संतोष आहे;
तुझें शास्त्र माझ्या अंतर्यामीं आहे.
९ महासभेंत मीं धार्मिकतेचें सुवृत्त सांगितलें;
हे परमेश्वरा, मीं आपलें तोंड बंद केलें नाहीं
हें तूं जाणतोस.
१० मीं आपल्या मनांत तुझें न्यायीपण छपवून
ठेविलें नाहीं;
तुझी सत्यता व तूं सिद्ध केलेलें तारण मीं विदित
केलें; महासभेपासून तुझें वात्सल्य व तुझें सत्य मीं
गुप्त ठेविलें नाहीं.
११ हे परमेश्वरा, तूं मजविषयींचा आपला कळवळा
आवरून धरूं नको;
तुझें वात्सल्य व तुझें सत्य हीं माझें नित्य रक्षण करोत.
१२ असंख्य अरिष्टांनीं मला घेरिलें आहे;
माझ्या दुष्कर्मांनीं मला पछाडिलें आहे म्हणून
मला वर तोंड करितां येत नाहीं;
तीं माझ्या डोक्याच्या केसांपेक्षां अधिक आहेत;
माझ्यांत त्राण उरलें नाहीं.
१३ हे परमेश्वरा, प्रसन्न होऊन मला मुक्त कर;
हे परमेश्वरा, माझें साहाय्य करण्यास त्वरा कर.
१४ जे माझा जीव घ्यावयास पाहतात
ते एकंदर लज्जित व फजीत होवोत;
माझे विघ्नसंतोषी मागें हटून अप्रतिष्ठा पावोत.
१५ मला अहाहा! अहाहा! असें थट्टेनें म्हणणाऱ्यांची
फजिती होऊन त्यांचीं तोंडें बंद पडोत.
१६ तुला शरण येणारे सर्व तुझ्या ठायीं आनंद व
उल्लास पावोत;
तूं सिद्ध केलेलें तारण प्रिय मानणारे
परमेश्वराचा महिमा वाढो असें सतत म्हणोत.
१७ मी तर दीन व दरिद्री आहें;
तरी प्रभूला माझी चिंता आहे;
माझा साहाय्यकारी व माझा मुक्तिदाता तूं आहेस;
हे माझ्या देवा, विलंब लावूं नको.

## ४१ [ मुख्य गवयासाठीं; दाविदाचें स्तोत्र ]

१ जो दीनांची चिंता वाहतो तो धन्य!
संकटसमयीं परमेश्वर त्याला मुक्त करील.
२ परमेश्वर त्याचें रक्षण करील व त्याचा प्राण
वांचवील; भूतलावर तो सुखी होईल,
आणि तूं त्याला त्याच्या वैऱ्यांच्या इच्छेवर सोड-
णार नाहींस.
३ तो रोगानें अंथरुणास खिळला असतां परमेश्वर
त्याला संभाळील;
तो[1] रोगी असतां तूं त्याचें अंथरूण बदलितोस.

१ अथवा: तुझ्यासारखा कोणी नाहीं;

१ अथवा: तूं त्याचा रोग दूर करून त्याला बरें करितोस.

४ मी म्हणालों, हे परमेश्वरा, मजवर कृपा कर;
माझ्या जिवाला बरें कर;
मीं तुजविरुद्ध पाप केलें आहे.
५ माझे वैरी मजविषयीं अभद्र बोलून म्हणतात कीं
हा केव्हां मरेल आणि याचें नांवगांव केव्हां नाहींसें
होईल;
६ त्यांच्यापैकीं कोणी माझ्या समाचारास आला तर
तोंवरपांगी बोलतो;
तो आपल्या मनांत कुकल्पना सांठवितो;
आणि बाहेर जाऊन त्या सांगतो.
७ माझे सर्व द्वेष्टे मिळून मजविरुद्ध कुजबुज करितात
आणि माझ्या अहिताच्या मसलती योजितात:
८ त्याला दुष्ट रोग जडला आहे,
तो पडला आहे, तो आतां उठणार नाहीं असें
ते म्हणतात.
९ जो माझा सखा, ज्यावर माझा विश्वास होता,
ज्यानें माझें अन्न खाल्लें त्यानेंहि मजवर लात उगा-
रिली आहे.
१० हे परमेश्वरा, मजवर दया करून मला उठीव,
म्हणजे मी त्यांचें उसनें फेडीन.
११ माझा वैरी मजविरुद्ध जयोत्सव करीत नाहीं,
यावरून तूं मजवर प्रसन्न आहेस असें मी समजतों.
१२ मला तर तूं माझ्या सात्विकपणांत स्थिर राखितोस,
मला तूं आपल्या सन्मुख सर्वकाळ ठेवितोस.

१३ इस्राएलाचा देव परमेश्वर
युगानुयुग धन्यवादित आहे.
आमेन, आमेन.

# भाग दुसरा

## ४२

[ मुख्य गवयासाठीं; कोरहाच्या
पुत्रांचें मास्कील ( ध्यानपर स्तोत्र ) ]

१ हरिणी जशी पाण्याच्या प्रवाहांसाठीं लुलपते
तसा हे देवा, माझा जीव तुजसाठीं लुलपत आहे.
२ माझा जीव देवासाठीं, जीवंत देवासाठीं तान्हेला
झाला आहे;
मी केव्हां देवासमोर येऊन त्याचें दर्शन घेईन ?
३ तुझा देव कोठें आहे, असें ते मला सतत म्हणतात,
म्हणून अहोरात्र माझे अश्रु माझा आहार झाले
आहेत.
४ लोकसमुदाय सण करीत तेव्हां त्यांच्या मेळ्या-
बरोबर मी कसा चाललें,
आणि आनंदोत्सव व देवस्तवन यांचा गजर चालला
असतां
देवाच्या मंदिराकडे त्यांस मी कसा मिरवीत नेई,
याची मला आठवण झाली म्हणजे माझा जीव
हळहळ होतो.
५ हे माझ्या जिवा, तूं कां खिन्न झालास ?
तूं आंतल्या आंत कां तळमळत आहेस ?
देवाची आशा धर; तो मला दर्शन देऊन माझा
उद्धार करितो,
म्हणून मी त्याचें पुनरपि गुणगान गाईन.
६ हे माझ्या देवा, माझा जीव माझ्या ठायीं खिन्न
झाला आहे.
म्हणून यार्देनेच्या व हर्मोनाच्या प्रदेशांत
व मिसहारच्या डोंगराजवळ मी तुझें स्मरण करितों.
७ तुझ्या धबधब्यांच्या आवाजानें जणूं काय डोंहा
डोंहाला बोलावीत आहे;
तुझ्या सर्व लाटा व कल्लोळ मजवरून गेले आहेत.
८ तरी परमेश्वर दिवसां आपलें वात्सल्य प्रकट
करील;
मी रात्रीस त्याचें गीत,

माझ्या जीवनदात्या देवाची प्रार्थना, गात राहीन.
९ देव जो माझा खडक त्यास मी म्हणेन: तूं मला कां विसरलास ?
वैऱ्याच्या जाचामुळें सुतक्याच्या वेषानें मीं कां फिरावें ?
१० तुझा देव कोठें आहे असें माझे शत्रु मला एकसारखें म्हणून माझी निंदा करितात;
तेणेंकरून माझ्या हाडांचा चुराडा होतो.
११ हे माझ्या जिवा, तूं कां खिन्न झालास ?
तूं आंतल्या आंत कां तळमळत आहेस ?
देवाची आशा धर; तो मला दर्शन देऊन माझा उद्धार करितो,
म्हणून मी त्याचें पुनरपि गुणगान गाईन.

४३

१ हे देवा, माझा न्याय कर;
भक्तिहीन राष्ट्राशीं माझ्या पक्षानें लढ;
कपटी व कुटिल मनुष्यापासून मला मुक्त कर.
२ कारण हे देवा, तूं माझा बळकट दुर्ग आहेस;
तूं माझा कां त्याग केला
वैऱ्याच्या जाचामुळें सुतक्याच्या वेषानें मीं कां फिरावें ?
३ तूं आपला प्रकाश व आपलें सत्य प्रगट कर;
तीं मला मार्ग दाखवोत;
तुझ्या पवित्र डोंगरावर, तुझ्या निवासस्थानीं मला पोहंचवोत;
४ म्हणजे मी देवाच्या वेदीजवळ, देव जो माझा परमानंद त्याजजवळ जाईन;
आणि हे देवा, माझ्या देवा,
वीणेवर मी तुझें गुणगान गाईन.
५ हे माझ्या जिवा, तूं कां खिन्न झालास ?
तूं आंतल्या आंत कां तळमळत आहेस ?
देवाची आशा धर; तो मला दर्शन देऊन माझा उद्धार करितो,
म्हणून मी पुनरपि त्याचें गुणगान गाईन.

४४

[ मुख्य गवयासाठीं; कोरहाच्या पुत्रांचें मास्कील ( ध्यानपर स्तोत्र ) ]

१ हे देवा, आमच्या पूर्वजांच्या दिवसांत,
पुरातन काळीं, तूं एक कार्य केलें;
त्याचें वर्णन त्यांनीं केलें, व तें आम्हीं आपल्या कानांनीं ऐकलें.
२ तूं आपल्या हातानें राष्ट्रांस घालवून तेथें यांस स्थापिलें;
त्या लोकांस क्लेश देऊन यांचा विस्तार केला.
३ यांनी आपल्या तरवारीनें देशाची मालकी मिळविली असें नाहीं,
यांच्या बाहुबलानें यांस विजयप्राप्ति झाली असें नाहीं,
तर तुझा उजवा हात, तुझा भुज व तुझें मुखतेज यांनीं ती झाली,
कारण यांजवर तुझी कृपादृष्टि होती.
४ हे देवा, तूंच माझा राजा आहेस;
याकोबाला जयावर जय प्राप्त होईल असें कर.
५ आम्ही तुझ्या साहाय्यानें आपल्या शत्रूंस उलथून टाकूं;
आम्हांवर उठणाऱ्यांची तुझ्या नामानें पायमल्ली करूं.
६ मी आपल्या धनुष्यावर भिस्त ठेवीत नाहीं,
माझी तरवार माझा बचाव करावयाची नाहीं.
७ तर आमच्या शत्रूंपासून तूं आमचा बचाव करितोस
आणि आमचा द्वेष करणाऱ्यांस तूं फजीत करितोस.
८ आम्ही सतत देवाची प्रतिष्ठा मिरवितों,
आणि तुझ्या नामाचें सर्वकाळ उपकारस्मरण करितों. [ सेला ]
९ तरी आतां तूं आम्हांस टाकिलें आहे, आम्हांस फजीत केलें आहे;
आमच्या सैन्यांबरोबर तूं जात नाहींस.
१० तूं आम्हांस शत्रूला पाठ दाखवावयास लाविलें,
आमचा द्वेष करणारे आम्हांस यथेच्छ लुटितात.

११ तूं आम्हांस मेंढरांसारखें भक्ष्यरूप केलें आहे;
आणि तूं राष्ट्रांराष्ट्रांमध्यें आमची दाणादाण केली आहे.
१२ तूं आपले लोक फुकटवारीं विकिले,
त्यांची किंमत घेऊन आपला फायदा केला नाहीं.
१३ तूं आम्हांस आमच्या शेजाऱ्यांच्या निंदेचा विषय केलें,
आमच्या सभोवतालच्या लोकांच्या उपहासाचा व धिःकाराचा विषय केलें.
१४ तूं राष्ट्रांत आमचें नांव निंदासूचक असें केलें;
व आम्हांस पाहून लोकांनीं डोकें हालवावें असें तूं केलें.
१५ माझी फजिती नित्य मजपुढें आहे
आणि माझ्या मुखावरील लज्जेनें मला व्यापिलें आहे;
१६ कारण निंदा व निर्भर्त्सना करणाऱ्यांचे शब्द मी ऐकत आहें
आणि वैरी व सूड उगविणारे माझ्या दृष्टीसमोर आहेत.
१७ हें सर्व आम्हांवर आलें तरी, आम्ही तुला विसरलों नाहीं;
तुझ्या करारासंबंधानें आम्हीं विश्वासघात केला नाहीं.
१८ आमचें मन फितूर झालें नाहीं;
आमचीं पाउलें तुझ्या मार्गांतून ढळलीं नाहींत;
१९ तरी तूं आम्हांस कोल्हे राहण्याच्या ठिकाणीं ठेचिलें,
मृत्युच्छायेनें आच्छादिलें.
२० जर आम्ही आपल्या देवाचें नाम विसरलों असतों
व अन्य देवापुढें हात पसरले असते,
२१ तर देवानें हें शोधून काढलें नसतें काय ?
कारण तो मनांतील गुप्त गोष्टी जाणतो.
२२ तरी तुझ्यामुळें आमचा वध सतत होत आहे;
कापावयाच्या मेंढरांसारखें आम्हांस गणितात.
२३ हे प्रभू, जागा हो, कां निजलास ?
ऊठ, तूं आमचा कायमचा त्याग करूं नको.
२४ तूं आपलें मुख कां लपवितोस ?
आमचें दुःख व आमचा छळ कां विसरतोस ?
२५ आमचा जीव धुळीस मिळत आहे,
आमचें पोट भूमीस लागत आहे.
२६ आमच्या साहाय्यार्थ ऊठ,
आपल्या वात्सल्यास्तव आमचा उद्धार कर.

## ४५

[ मुख्य गवयासाठीं; शोशन्नीम (भूकमल) या चालीवर गावयाचें कोरहाच्या पुत्रांचें मास्कील (ध्यानपर स्तोत्र); प्रेमगीत ]

१ माझ्या मनांत चांगल्या विचारांची उकळी आली आहे;
राजाविषयीं जें काव्य मीं रचिलें तें मी म्हणून दाखवितों;
माझी जीभ चतुर लेखकाची लेखणी अशी आहे.
२ मानवजातींत तूं अति सुंदर आहेस;
तुझ्या मुखांत प्रसाद भरला आहे;
यामुळें देवानें तुला सर्वकाळ धन्यवादित केलें आहे.
३ हे वीरा, तूं आपली तरवार कंबरेला बांध,
आपलें वैभव व आपला प्रताप धारण कर.
४ सत्य, नम्रता व न्यायपरायणता यांच्याप्रीत्यर्थ प्रतापानें स्वारी करून विजयशाली हो,
म्हणजे तुझा उजवा हात तुला भयानक कृत्यें करावयास शिकवील.
५ तुझे बाण तीक्ष्ण आहेत;
लोक तुजपुढें चीत होतात;
तुझे बाण राजाच्या शत्रूंच्या हृदयांत शिरतात.
६ हे देवा, तुझें सिंहासन युगानुयुगींचें आहे;
तुझें राजवेत्र सरळतेचें वेत्र आहे.
७ तुला न्यायाची आवड व दुष्टाईचा वीट आहे;
म्हणून देवानें, तुझ्या देवानें, तुझ्या बरोबरीच्या लोकांपेक्षां श्रेष्ठ असा
हर्षरूप तेलाचा अभिषेक तुला केला आहे.
८ बोळ, अगरू व तज यांचा सुगंध तुझ्या सर्व वस्त्रांना येत आहे;

हस्तिदंती राजमंदिरांतील तंतुवाद्यें तुला आनंदित
करितात.
९ तुझ्या सन्मान्य स्त्रियांमध्यें राजकन्या आहेत;
राणी ओफीरच्या सुवर्णानें मंडित होऊन तुझ्या
उजवीकडे उभी आहे.
१० अगे कन्ये, ऐक, लक्ष दे, कान लाव;
तूं आपले लोक व आपल्या बापाचें घर
हीं विसर.
११ राजा तुझ्या सौंदर्याचा अभिलाषी आहे;
तो तुझा पति आहे, म्हणून त्याच्या चरणीं लाग.
१२ सोराची कन्या तुला नजराणा आणील;
धनवान् लोक तुझें आर्जव करितील.
१३ राजकन्या आपल्या अंतःपुरांत अगदीं ऐश्वर्यमंडित
आहे;
तिचीं वस्त्रें भरजरी आहेत.
१४ तिला कशिद्याचीं वस्त्रें नेसवून राजाकडे मिरवीत
नेतील,
तिच्यामागून चालणाऱ्या कुमारींना तिच्या सख्या
तुजकडे आणितील.
१५ आनंदानें व उत्सवानें त्यांस मिरवितील.
त्या राजमंदिरांत प्रवेश करितील.
१६ तुझ्या वडिलांच्या ठिकाणीं तुझीं मुलें येतील;
तूं सर्व पृथ्वीवर त्यांस अधिपति करिशील.
१७ तुझ्या नामाचें स्मरण पिढ्यानपिढ्या राहील असें
मी करीन,
म्हणजे लोक युगानुयुग तुझें उपकारस्मरण
करितील.

## ४६ [मुख्य गवयासाठीं; कोरहाच्या पुत्रांचें टिपेच्या सुरानें गावयाचें स्तोत्र]

१ देव आमचा आश्रय व आमचें सामर्थ्य आहे;
तो संकटसमयीं साहाय्य करण्यास सदा सिद्ध
असतो.
२ यास्तव पृथ्वी उलथीपालथी झाली,
पर्वत कोसळून सागरतळीं बुडाले;
३ त्याच्या लाटा गर्जून उचंबळल्या,
त्यांच्या उचंबळण्यानें पर्वत हालले तरी आम्ही
भिणार नाहीं. [सेला]
४ अशी एक नदी आहे कीं तिचे प्रवाह देवाच्या
नगराला,
परात्पराच्या परमपवित्र निवासस्थानाला आनंदमय
करितात.
५ त्याच्या ठायीं देव आहे; तें ढळावयाचें नाहीं;
प्रभात होतांच देव त्याचें साहाय्य करील.
६ राष्ट्रें खवळलीं, राज्यें डळमळलीं;
त्यानें गर्जना केली तों पृथ्वी विरघळून गेली.
७ सेनाधीश परमेश्वर आम्हांबरोबर आहे;
याकोबाचा देव आमचा आश्रय आहे. [सेला]
८ या, परमेश्वराचीं कृत्यें पाहा,
त्यानें पृथ्वीची कशी नासधूस केली आहे.
९ तो दिगंतापर्यंत लढाया बंद करितो;
तो धनुष्य मोडितो, भाला तोडून टाकितो;
रथ अग्नींत जाळून टाकितो.
१० शांत व्हा आणि लक्षांत ठेवा कीं मीच देव आहें,
राष्ट्रांमध्यें माझी महती होईल.
पृथ्वीभर माझी महती होईल.
११ सेनाधीश परमेश्वर आम्हांबरोबर आहे;
याकोबाचा देव आमचा आश्रय आहे. [सेला]

## ४७ [मुख्य गवयासाठीं; कोरहाच्या पुत्रांचें स्तोत्र]

१ अहो सर्व लोकहो, टाळ्या वाजवा;
उत्साहशब्दांनीं देवाचा जयजयकार करा.
२ कारण परमेश्वर परात्पर व भयप्रद आहे;
तो अखिल पृथ्वीचा महान् सार्वभौम राजा आहे.
३ तो लोकांस हतवीर्य करून आमच्या तान्यांत
देतो;
राष्ट्रांस आमच्या पायांखालीं घालितो.
४ त्याचा आवडता याकोब ज्यास ज्या वतनाचा
अभिमान होता,

तें त्यानें आम्हांसाठीं निवडिलें आहे. [सेला]
५ जयघोष होत असतां देव वर गेला आहे,
कर्ण्याचा शब्द होत असतां परमेश्वर वर गेला आहे.
६ देवाचीं स्तुतिस्तोत्रें गा, स्तुतिस्तोत्रें गा;
आमच्या राजाचीं स्तुतिस्तोत्रें गा, स्तुतिस्तोत्रें गा.
७ कारण देव सर्व पृथ्वीचा राजा आहे;
तुम्ही लक्षपूर्वक त्याचीं स्तुतिस्तोत्रें गा.
८ देव राष्ट्रांवर राज्य करीत आहे;
देव आपल्या पवित्र सिंहासनावर बसला आहे.
९ राष्ट्रांतले अधिपति जमले आहेत;
अब्राहामाच्या देवाची प्रजा एकत्र झाली आहे;
कारण पृथ्वीवरील सर्व ढाली देवाच्या आहेत;
तो परम थोर आहे.

## ४८ [कोरहाच्या पुत्रांचें संगीत स्तोत्र]

१ परमेश्वर थोर आहे, आमच्या देवाच्या नगरांत,
त्याच्या पवित्र डोंगरावर, तो स्तुतीस अत्यंत पात्र आहे.
२ उत्तर सीमेवरील सीयोन डोंगर,
राजाधिराजाचें नगर,
उच्चतेमुळें सुंदर व सर्व पृथ्वीचा आनंद आहे.
३ त्याच्या मंदिरांत देव
आश्रयदुर्ग असा प्रकट झाला आहे.
४ राजे एकत्र होऊन
जुटीनें चढाई करून आले.
५ ते पाहतांच विस्मित झाले,
घाबरे होऊन पळत सुटले.
६ तेथें त्यांस कंप सुटला;
त्यांस प्रसूतिवेदनांप्रमाणें वेदना झाल्या.
७ पूर्वेच्या वाऱ्यानें
तार्शीशचीं गलबतें तूं फोडितोस.
८ जें आम्हीं ऐकलें
तें सेनाधीश परमेश्वराच्या नगरांत,
आमच्या देवाच्या नगरांत पाहिलें;
तें हें कीं देव सर्वकाल तें स्थिर राखील. [सेला]
९ हे देवा, तुझ्या मंदिरांत
आम्हीं तुझ्या वात्सल्याचें चिंतन केलें.
१० हे देवा, जसें तुझें नाम,
तशी तुझी कीर्ति दिगंतापर्यंत जात आहे;
तुझा उजवा हात न्यायपूर्ण आहे.
११ तुझ्या न्यायकृत्यामुळें सीयोन डोंगर आनंद पावो,
यहुदाच्या कन्या उल्लासोत.
१२ सीयोनासभोंवतीं फिरा, त्याला फेरा घाला;
त्याचे बुरूज मोजा;
१३ त्याच्या प्राकारांकडे लक्ष द्या,
त्याच्या मंदिरांतून फिरा
म्हणजे पुढील पिढीला त्याविषयीं तुम्हांला सांगतां येईल.
१४ हा देव आमचा सनातन देव आहे;
तो सर्वकाळ आमचा मार्गदर्शक होईल.

## ४९ [मुख्य गवयासाठीं; कोरहाच्या पुत्रांचें स्तोत्र]

१ अहो सर्व लोकहो, हें ऐका;
जगांत राहणारे उच्च व नीच,
२ श्रीमंत व दरिद्री लोकहो,
तुम्ही सर्व कान द्या.
३ माझें मुख ज्ञान वदणार आहे;
माझ्या मनचे विचार सुज्ञतेचे असणार.
४ मी दृष्टांताकडे कान लावीन;
वीणेवर गाणें गाऊन गूढवचन उलगडून सांगेन.
५ मला फसविणाऱ्यांचा दुष्टपणा मला वेढितो;
अशा विपत्कालीं मीं कां भ्यावें?
६ ते तर आपल्या संपत्तीवर भरंवसा ठेवितात;
व आपल्या विपुल धनाचा तोरा मिरवितात.
७ कोणाहि मनुष्यास आपल्या भावाला मुक्त करितां येत नाहीं,
किंवा त्याच्याबद्दल देवाला खंडणी भरून देतां येत नाहीं.

८ त्यानें सर्वदा जगावें, त्याला कधीं गर्तेचा अनुभव
घडूं नये,
म्हणून त्याच्यानें देवाला खंडणी देववत नाहीं;
९ कारण त्याच्या जिवाची खंडणी इतकी मोठी आहे कीं
तिची भरपाई करण्याचें नेहमीं राहणारच.
१० कारण तो पाहतो कीं ज्ञानी मरतात,
तसेंच जड व मतिमंद हे नष्ट होतात,
आणि आपलें धन दुसऱ्यांना ठेवून जातात.
११ ते मनांतल्या मनांत म्हणतात कीं
आमचीं घरें सदोदित राहतील;
आमचीं ठिकाणें पिढ्यानपिढ्या टिकतील;
ते आपल्या जमिनींस आपलीं नांवें देतात.
१२ मनुष्य प्रतिष्ठा पावला तरी टिकत नाहीं;
तो नश्वर पशूंसारखा आहे.

१३ जे अभिमानी आहेत त्यांची,
व त्यांचें बोलणें ज्यांस पसंत पडतें अशा त्यांच्या
अनुयायांचीहि हीच गति आहे. [ सेला ]
१४ ते मेंढरांच्या कळपासारखे अधोलोकांकरितां नेमि-
लेले आहेत;
मृत्यु त्यांचा मेंढपाळ आहे;
प्रभातकाल प्राप्त झाला म्हणजे नीतिमान् त्यांजवर
प्रभुत्व करितील;
त्यांचे देह अधोलोकांत क्षय पावतील;
त्यांना वस्तीला कोठें थारा राहणार नाहीं;
१५ परंतु देव माझा जीव अधोलोकाच्या कबजां-
तून सोडवील;
तो मला आपणाजवळ घेईल. [ सेला ]

१६ कोणी मनुष्य धनवान् झाला,
त्याच्या घरचा डामडौल वाढला तरी तूं घाबरूं नको;
१७ कारण तो मृत्यु पावेल तेव्हां बरोबर कांहींच घेऊन
जाणार नाहीं;
त्याचा थाटमाट त्याच्यामागून खालीं उतरणार नाहीं.
१८ तो जिवंत असतां आपल्या जिवाला धन्य म्हणे;
तूं आपलें बरें करून घेतलें म्हणजे लोक तुझा
स्तुतिपाठ गातात.
१९ तरी तो आपल्या वडिलांच्या पिढीला जाऊन मिळेल;
त्यांच्या दृष्टीस प्रकाश कधींच पडावयाचा नाहीं.
२० मनुष्य प्रतिष्ठित असून त्याला अक्कल नसली,
तर तो नश्वर पशूंसारखा आहे.

## ५० [ आसाफाचें स्तोत्र ]

१ देवाधिदेव परमेश्वर बोलला आहे,
त्यानें सूर्याच्या उगवतीपासून मावळतीपर्यंत पृथ्वीला
हाक मारिली आहे,
२ सौंदर्याचा केवळ कळस असा सीयोन डोंगर,
त्यावरून देव प्रकाशला आहे.
३ आमचा देव येत आहे, तो उगा राहावयाचा
नाहीं;
त्याजपुढें अग्नि ग्राशीत चालला आहे,
त्याच्याभोंवतीं मोठें वादळ सुटलें आहे.
४ त्यानें आपल्या लोकांचा न्याय करावा
म्हणून तो वर आकाशास व पृथ्वीस हाक मारून
म्हणतो :
५ ज्यांनीं यज्ञ करून मजशीं करार केला आहे,
त्या माझ्या भक्तांस माझ्याजवळ एकत्र करा.
६ आकाश त्याची न्यायपरायणता प्रकट करितें;
देव स्वतः न्याय करणार आहे. [ सेला ]

७ माझ्या लोकांनो, ऐका, मी बोलत आहें;
हे इस्राएला, मी तुला प्रतिज्ञापूर्वक सांगतों:
मी देव, तुझा देव आहें;
८ तुझ्या यज्ञासंबंधानें तर मी तुला बोल
लावीत नाहीं;
तुझे होमबलि मजपुढें नित्य आहेतच.
९ तुझ्या घरचा खोंड किंवा तुझ्या मेंढवाड्यांतले बोकड
मी घ्यावयाचा नाहीं.
१० कारण वनांतील सर्व पशु,
हजारों डोंगरांवरील गुरेंढोरें माझीं आहेत.
११ डोंगरांवरील सर्व पाखरें मला ठाऊक आहेत;
आणि रानांतील प्राणी माझ्या लक्षांत आहेत.
१२ मला भूक लागली तरी मी तुला सांगणार नाहीं,

कारण जग व जगांतलें सर्व कांहीं माझें आहे.
१३ बैलांचें मांस मी खाणार काय ?
बोकडांचें रक्त मी पिणार काय ?
१४ देवाला आभाररूपी यज्ञ कर;
परात्परापुढें आपले नवस फेड;
१५ संकटसमयीं माझा धावा कर;
मी तुला मुक्त करीन आणि तूं माझें गौरव करिशील.
१६ दुर्जनाला तर देव म्हणतो :
माझे नियम विदित करणारा तूं कोण ?
माझा करार आपल्या मुखानें उच्चारणारा तूं कोण ?
१७ तूं तर माझ्या शासनाचा तिरस्कार करितोस,
माझीं वचनें मागें झुगारून देतोस.
१८ तूं चोर पाहिला कीं तुला आनंद झालाच;
तूं व्यभिचारी इसमांचा साथीदार आहेस.
१९ तूं आपलें तोंड दुष्टपणासाठीं मोकळें सोडिलें आहे,
तुझी जिव्हा कपटाची योजना करिते.
२० तूं आपल्या भावाविरुद्ध बोलत बसतोस;
तूं आपल्या सहोदराची चहाडी करितोस.
२१ असें तूं केलें तरी मी उगा राहिलों;
मी तुजसारखाच आहें असें तुला वाटलें;
तथापि मी तुझा निषेध करीन,
मी तुझीं कर्में तुजपुढें मांडीन.
२२ अहो देवाला विसरणाऱ्यांनो, याचा विचार करा,
नाहीं तर मी तुम्हांस फाडून टाकीन,
तेव्हां तुम्हांस कोणी सोडविणारा सांपडावयाचा नाहीं.
२३ जो आभाररूपी यज्ञ करितो तो माझें गौरव करितो;
आणि जो आपला मार्ग नीट ठेवितो त्याला मी ईश्वरकृत तारण प्राप्त करून देईन.

५१

[मुख्य गवयासाठीं; दाविदाचें स्तोत्र; त्यानें बथशेबेशीं समागम केल्यानंतर नाथान संदेष्टा त्याजकडे आला तेव्हांचें ]

१ हे देवा, तूं आपल्या वात्सल्यास अनुसरून मजवर कृपा कर;
तूं आपल्या विपुल करुणेस अनुसरून माझे अपराध पुसून टाक.
२ मला धुऊन माझा दोष अगदीं काढून टाक,
माझें पाप दूर करून मला स्वच्छ कर.
३ कारण मी आपले अपराध जाणून आहें,
माझें पाप मजपुढें नित्य आहे.
४ तुजविरुद्ध, तुजविरुद्धच मीं पाप केलें आहे,
तुझ्या दृष्टीनें जें वाईट तें मीं केलें आहे;
म्हणून तूं बोलशील तेव्हां न्यायी ठरशील,
व निवाडा करिशील तेव्हां निर्दोष ठरशील,
५ पाहा, मी जन्माचाच पापी आहें;
माझ्या आईनें गर्भधारण केलें तेव्हांचाच मी पातकी आहें.
६ पाहा, अंतर्यामींची सत्यता तुला आवडते;
तूं माझ्या अंतर्यामाला ज्ञानाची ओळख करून दे.
७ एजोबानें माझा पापमल काढ म्हणजे मी निर्मळ होईन;
मला धू म्हणजे मी बर्फाहून पांढरा होईन.
८ आनंदाचे व हर्षाचे शब्द माझ्या कानीं पडूं दे;
म्हणजे तूं मोडिलेलीं माझीं हाडें उल्लसतील.
९ माझ्या पापांपासून तूं आपलें तोंड फिरीव;
माझे सर्व अपराध पुसून टाक.
१० हे देवा, माझ्या ठायीं शुद्ध हृदय उत्पन्न कर;
माझ्या ठायीं स्थिर असा आत्मा पुनः घाल.
११ तूं मला आपल्यापुढून घालवून देऊं नको;
आणि आपला पवित्र आत्मा मजमधून काढून घेऊं नको.
१२ तूं केलेल्या उद्धाराचा आनंद मला पुनः होऊं दे;
आणि उत्सुकतेच्या आत्म्यानें मला सावरून धर;
१३ म्हणजे मी अपराध्यांस तुझे मार्ग शिकवीन;
आणि पातकी तुजकडे वळतील.
१४ हे देवा, माझ्या उद्धारक देवा,
तूं मला रक्तपाताच्या दोषापासून मुक्त कर,

म्हणजे माझी जिव्हा तुझ्या न्यायपरायणतेचा गजर करील.
१५ हे प्रभू, माझे ओठ उघड;
म्हणजे माझें मुख तुझी कीर्ति वर्णील.
१६ तुला पशुयज्ञ आवडत नाहीं, नाहीं तर तो मीं केला असता;
होमबलिहि तुला प्रिय नाहीं.
१७ देवाचे यज्ञ म्हणजे भग्न आत्मा;
हे देवा, भग्न व अनुतप्त हृदय तूं तुच्छ मानणार नाहींस.
१८ तूं प्रसन्न होऊन सीयोनाचें हित कर,
यरुशलेमाचे कोट बांधून काढ;
१९ म्हणजे धार्मिकतेनें केलेले यज्ञ, होमबलि, निःशेष होमबलि तुला आवडतील;
मग ते तुझ्या वेदीवर गोऱ्हे अर्पितील.

## ५२

[ मुख्य गवयासाठीं दाविदाचें मास्कील ( बोधपर स्तोत्र ). दावीद अहीमलेखाच्या घरीं आला आहे असें दवेग अदोमी यानें शौलाकडे येऊन त्याला कळविलें तेव्हांचें ]

१ हे बलवान् पुरुषा, दुष्कर्माची आढयता कां मिरवितोस ?
देवाचें वात्सल्य अखंड आहे.
२ अरे कपट करणाऱ्या, तुझी जिव्हा तीक्ष्ण
वस्तऱ्यासारखी अनर्थाची योजना करिते.
३ तुला बऱ्याची नव्हे तर वाइटाची;
सत्याची नव्हे तर असत्याची आवड आहे. [ सला ]
४ अगे कपटी जिभे,
तुला सर्व विध्वंसकारक शब्द आवडतात;
५ परंतु देव तुझा समूळ नाश करील;
तुला धरून डेऱ्यांतून खेचून काढील;
जीवंतांच्या भूमींतून मुळांसकट उपटून टाकील. [ सेला ]
६ सत्पुरुष हें पाहून भितील,
ते त्याला हसून म्हणतील :
७ पाहा, हाच तो पुरुष, यानें देवाला आपलें आश्रयस्थान केलें नाहीं,
तर त्यानें आपल्या विपुल धनावर भरंवसा ठेविला
आणि हा दुष्कर्मानें माजला.
८ मी तर देवाच्या घरीं हिरव्यागार जैतून झाडासारखा आहें;
देवाच्या दयेवर सदासर्वकाळ माझा भरवसा आहे.
९ हें तूं घडवून आणिलें आहे म्हणून मी सर्वकाळ तुझें उपकारस्मरण करीन;
तुझ्या भक्तांसमोर तुझ्या नामाची घोषणा करीन,
कारण तें उत्तम आहे.

## ५३

[ मुख्य गवयासाठीं; महलथ या चालीवर गावयाचें दाविदाचें मास्कील ( बोधपर स्तोत्र ) ]

१ मूढ आपल्या मनांत म्हणतो, देव नाहीं.
लोक दुष्ट व अमंगळ कर्में करितात;
सत्कर्म करणारा कोणी नाहीं.
२ कोणी समंजस आहे कीं काय,
कोणी देवभक्त आहे कीं काय,
हें पाहण्यासाठीं देवानें मानवांकडे स्वर्गांतून अवलोकन केलें.
३ ते एकूणएक मार्गभ्रष्ट झाले आहेत; एकंदर सर्व बिघडले आहेत;
सत्कर्म करणारा असा कोणी नाहीं, एकहि नाहीं.
४ दुष्कर्म करणारे अगदीं ज्ञानशून्य आहेत काय ?
ते भाकरीप्रमाणें माझ्या लोकांस खातात,
देवाचें नाम घेत नाहींत.
५ भय नसतां ते भयभीत झाले आहेत;
कारण तुझ्याविरुद्ध छावणी देऊन बसणाऱ्यांचीं हाडें देवानें विखरिलीं आहेत;
तूं त्यांची फजिती केली आहे, कारण देवानें त्यांचा धिक्कार केला आहे.
६ देव करो आणि सीयोनांतून इस्राएलचा उद्धार होवो.
देव आपल्या लोकांचें दास्य उलटवील
तेव्हां याकोब उल्लासेल, इस्राएल हर्ष पावेल.

५४ [ मुख्य गवयासाठीं; तंतुवाद्यांच्या साथीनें गावयाचें दाविदाचें मास्कील ( बोधपर स्तोत्र ); दावीद आम्हांजवळ लपून राहिला नाहीं काय असें जिफी लोक शौलाकडे येऊन म्हणाले, तेव्हांचें ]

१ हे देवा, तूं आपल्या नामेंकरून मला तार;
आपल्या सामर्थ्यानें माझा न्याय कर.
२ हे देवा, माझी प्रार्थना ऐक;
माझ्या तोंडच्या शब्दांकडे कान दे.
३ कारण विदेशी लोक मजवर उठले आहेत;
दांडगे लोक माझा जीव घेण्यास पाहतात;
त्यांनीं देवाकडे लक्ष लाविलें नाहीं. [ सेला ]
४ पाहा, देव माझा साहाय्यकर्ता आहे;
माझ्या जिवाला आधार असलेल्यांबरोबर प्रभु आहे.
५ मजवर टपून बसणाऱ्या शत्रूंनीं केलेल्या अपकाराचा बदला तो त्यांस देईल;
तूं आपल्या सत्याच्या प्रभावानें त्यांचा उच्छेद कर.
६ मी स्वसंतोषानें तुला यज्ञबलि अर्पीन;
हे परमेश्वरा, तुझें नाम उत्तम आहे, मी त्याचें स्तवन करीन.
७ कारण त्यानें मला सर्व संकटांतून सोडविलें आहे;
माझ्या शत्रूंकडे पाहून माझे डोळे निवाले आहेत.

५५ [ मुख्य गवयासाठीं; तंतुवाद्यांच्या साथीनें गावयाचें दाविदाचें मास्कील ( बोधपर स्तोत्र ) ]

१ हे देवा, माझ्या प्रार्थनेकडे कान दे;
माझ्या विनंतीपासून तोंड फिरवूं नको.
२ मजकडे लक्ष दे, माझें ऐक;
मी चिंताक्रांत होऊन तळमळत व कण्हत आहें;
३ आणि तें वैऱ्याच्या शब्दामुळें व दुर्जनाच्या जाचामुळें;
कारण ते मजवर अरिष्ट आणितात व क्रोधानें माझ्या पाठीस लागतात.
४ माझ्या ठायीं माझ्या हृदयाला यातना होत आहेत;
मरणाचें भय मला लागलें आहे.
५ भीति व कांपरें हीं मजवर येऊन गुदरलीं आहेत;
घोरानें मला व्यापिलें आहे.
६ मीं म्हटलें, मला पारव्यासारखे पंख असते
तर मी उडून जाऊन कसा आराम पावलों असतों !
७ मीं दूर निघून जाऊन
रानांत वस्ती केली असती. [ सेला ]
८ प्रचंड वायु व वादळ यांपासून
आसरा मिळविण्याची मीं त्वरा केली असती.
९ हे प्रभू, त्यांचा विध्वंस कर,
त्यांच्या भाषेची भेळमेळ कर;
कारण मीं नगरांत जुलूम व कलह पाहिले आहेत.
१० अहोरात्र त्याच्या कोटावर ते सभोवतालीं फिरतात;
त्यामध्यें दुष्टाई व उपद्रव हीं चालू आहेत.
११ त्यामध्यें अनर्थ माजला आहे;
त्याच्या पेठेंतून जुलूम व कपट हीं निघून जात नाहींत;
१२ कारण ज्यानें माझी निंदा केली तो कांहीं माझा वैरी नव्हता;
असता तर मीं तें सोशिलें असतें;
मजवर ज्यानें तोरा मिरविला तो कांहीं माझा शत्रु नव्हता;
असता तर मी त्याजपासून लपून राहिलों असतों;
१३ पण तूंच तो, माझ्या बरोबरीचा इसम,
माझा सोबती व माझा सलगीचा मित्र, असा तूं होतास.
१४ आम्ही एकमेकांशीं गोडगोड गोष्टी बोलत असूं,
देवाच्या मंदिरांत मेळ्याबरोबर जात असूं.
१५ त्यांस अकस्मात् मरण येवो; ते जीवंतच अधोलोकीं उतरोत;
त्यांच्या घरांत व अंतर्यामांत दुष्टाई आहे.
१६ मी तर देवाचा धावा करीन,
आणि परमेश्वर मला तारील.
१७ संध्याकाळीं, सकाळीं व दुपारीं मी काकळुतीनें आपलें गाऱ्हाणें करीन
आणि तो माझी वाणी ऐकेल.

१८ त्यानें माझा जीव सोडवून सुरक्षित ठेविला आहे,
म्हणून मजवर कोणाला हल्ला करितां आला नाहीं;
मजशीं कलह करणारे तर बहुत होते.
१९ देव ऐकेल व त्यांचें पारिपत्य करील;
तोच अनादिकालापासून सिंहासनारूढ आहे. [ सेला ]
त्यांची वृत्ति पालटत नाहीं
आणि ते देवाला भीत नाहींत.
२० त्याजशीं जे सलोख्यानें होते त्यांजवर त्यानें
आपला हात उगारिला;
त्यानें आपला करार मोडिला.
२१ त्याच्या तोंडचे शब्द लोण्यासारखे मृदु होते, पण
त्याच्या हृदयांत कलह भरला होता;
त्याचे शब्द तेलापेक्षां बुळबुळीत, पण नागव्या
तरवारींसारखे होते.
२२ तूं आपला भार परमेश्वरावर टाक म्हणजे तो तुझा
पाठिंबा होईल;
धार्मिकाला तो कधींहि ढळूं देणार नाहीं.
२३ हे देवा, तूं त्या लोकांस गर्तेच्या तोंडांत
लोटून देशील;
खुनी व कपटी मनुष्यें अर्धें आयुष्यहि जगणार
नाहींत;
माझा भाव तर तुजवर आहे.

५६ [ मुख्य गवयासाठीं; योना एलेम रहोकीम (दूर असलेल्या लोकांतील स्तब्ध असा पारवा) या चालीवर गावयाचें; पलिष्टयांनीं दाविदाला गथ एथें धरिलें तेव्हां त्यानें रचिलेलें मिक्ताम नांवाचें स्तोत्र ]

१ हे देवा, मजवर दया कर, कारण मनुष्यें माझा
पिच्छा पुरवीत आहेत;
दिवसभर मजशीं लढून त्यांनीं माझा छळ मांडिला
आहे.
२ दिवसभर माझे शत्रु माझा पिच्छा पुरवीत आहेत;
मजशीं मगरुरीनें लढणारे बहुत आहेत;
३ मला भीति वाटेल तेव्हां
मी तुजवर भरंवसा टाकीन.
४ देवाच्या साहाय्यानें मी त्याच्या वचनाची
प्रशंसा करीन;
देवावर मीं भरंवसा ठेविला आहे,
मी भिणार नाहीं;
कोण माझें काय करणार ?
५ दिवसभर ते माझ्या शब्दांचा विपर्यास करितात;
त्यांचे सर्व विचार मजविरुद्ध, माझ्या वाइटासाठीं
असतात.
६ ते एकत्र मिळतात, ते दडून राहतात;
ते माझ्या पावलांवर पाळत ठेवितात;
ते माझा जीव घ्यावयास पाहतात.
७ इतकी त्यांची दुष्टाई असून ते सुटतील काय ?
हे देवा, लोकांस क्रोधानें पाडून टाक.
८ मी ज्या ज्या ठिकाणीं भटकलों तीं तूं मोजिलीं आहेत;
माझीं आसवें तूं आपल्या बुधलींत भरून ठेविलीं
आहेत;
तुझ्या वहींत तीं नमूद झालीं नाहींत काय ?
९ मी धावा करीन त्या दिवशीं माझे वैरी मागें फिरतील;
देव माझ्या पक्षाचा आहे हें मी जाणतों.
१० देवाच्या साहाय्यानें मी त्याच्या वचनाची
प्रशंसा करीन,
परमेश्वराच्या साहाय्यानें त्याच्या वचनाची प्रशंसा
करीन.
११ देवावर मीं भरंवसा ठेविला आहे.
मी भिणार नाहीं;
कोण माझें काय करणार ?
१२ हे देवा, तुझ्या नवसांचें ऋण मजवर आहे;
मी तुला आभाररूपी अर्पणें वाहीन.
१३ कारण तूं माझा जीव मरणापासून रक्षिला आहे;
जीवनाच्या प्रकाशांत देवासमोर मीं चालावें
म्हणून पतनापासून तूं माझे पाय रक्षिले नाहींस काय ?

५७ [ मुख्य गवयासाठीं; ताश्केथ (नष्ट करूं नको) या चालीवर गावयाचें; दावीद शौलापासून पळून गुहेंत गेला तेव्हां त्यानें रचिलेलें मिक्ताम नांवाचें स्तोत्र ]

१ हे देवा, मजवर दया कर, मजवर दया कर;
माझा जीव तुझा आश्रय करितो;
हीं अरिष्टें टळून जात तोंपर्यंत मी तुझ्या पक्षच्छायेचा आश्रय करीन.
२ परात्पर देवाचा,
माझें सर्व कांहीं सिद्धीस नेणाऱ्या देवाचा मी धावा करीन.
३ तो स्वर्गांतून पाठवून मला तारील;
कारण माझा पिच्छा पुरविणारा माझा उपहास करीत आहे; [सेला]
देव आपली दया व सत्य पाठवून देईल.
४ माझा जीव सिंहांमध्यें पडला आहे;
ज्यांचे दांत केवळ भाले व बाण आहेत,
ज्यांची जीभ तीक्ष्ण तरवारच आहे,
अशा जाज्वल्य मनुष्यांमध्यें देखील मी पडून राहीन.
५ हे देवा, आकाशांहून तूं उन्नत हो;
तुझें गौरव सर्व पृथ्वीभर होवो.
६ माझ्या पायांसाठीं त्यांनीं जाळें मांडिलें आहे;
माझा जीव गळून गेला आहे;
माझ्या वाटेंत त्यांनीं खाच खणिली,
तींत ते स्वतःच पडले आहेत. [सेला]
७ हे देवा, माझें चित्त स्थिर आहे, माझें चित्त स्थिर आहे;
मी गाईन, मी सुस्वर भजन करीन.
८ हे माझ्या जिवा, जागृत हो, हे सतारी, हे वीणे, जागृत व्हा;
मी प्रभातेला जागें करीन.
९ हे प्रभू, लोकांमध्यें मी तुझें उपकारस्मरण करीन,
राष्ट्रांमध्यें तुझीं स्तोत्रें गाईन;
१० कारण आकाशापर्यंत तुझी दया व गगनापर्यंत तुझें सत्य थोर आहे.
११ हे देवा, आकाशांवर उन्नत हो;
तुझें गौरव सर्व पृथ्वीभर होवो.

## ५८

[मुख्य गवयासाठीं; ताश्केथ (नष्ट करूं नको) या चालीवर गावयाचें, मिक्ताम नांवाचें दाविदाचें स्तोत्र]

१ अहो, तुम्ही न्यायनिवाडा खरोखर करितां काय?
तुम्ही मनुष्यांमनुष्यांमध्यें चोख निवाडा करितां काय?
२ नाहीं, तुम्ही मनांत दुष्कर्मे योजितां;
तुम्ही पृथ्वीवर आपल्या हातानें बलात्कार तोलून देतां.
३ मातेच्या उदरीं असतांनाच दुर्जन फितूर होतात
जन्मापासूनच असत्य बोलत बहकतात.
४ त्यांच्या ठायीं सर्पाच्या विषासारखें विष असतें;
जो बहिरा जोगी साप आपले कान झाकतो त्यासारखे ते आहेत;
५ मांत्रिक कितीहि निपुणतेनें मंत्र घालूं लागले,
तरी तो साप त्यांचा शब्द ऐकत नाहीं.
६ हे देवा, त्यांचे दांत त्यांच्याच घशांत घाल;
हे परमेश्वरा, तरुण सिंहांच्या दाढा पाडून टाक.
७ जोरानें येणाऱ्या लोंढ्याप्रमाणें ते वाहून जावोत;
तो बाण रोखील तेव्हां ते भंग पावल्याप्रमाणें होवोत.
८ सरपटतांना जणूं काय विरघळून जाणाऱ्या गोगलगाईसारखे,
ज्या पतन पावलेल्या गर्भाला सूर्यदर्शन होत नाहीं त्यासारखे ते होवोत.
९ तुमच्या पातेल्यांस कांटेच्या जळणाची आंच लागण्यापूर्वीच
त्यांतलें हिरवें असो, शिजलेलें असो,
तें तो वावटळीनें उडवून देईल.
१० सूड घेतला आहे असें पाहून धार्मिक हर्षेल;
दुष्टांच्या रक्तांत तो आपले पाय धुईल.
११ तेव्हां मनुष्यें म्हणतील कीं धार्मिकास निश्चयें फळ प्राप्त होते.

निश्चयें पृथ्वीवर न्याय करणारा देव आहे.

५९ [ मुख्य गवयासाठीं; ताश्केथ ( नष्ट करूं नको ) या चालीवर गावयाचें; शौलानें मनुष्यें पाठवून दाविदाला ठार मारण्याकरितां त्याच्या घरावर पहारा ठेविला तेव्हां त्यानें रचलेलें मिक्ताम नांवाचें स्तोत्र ]

१ हे माझ्या देवा, माझ्या वैऱ्यांपासून मला सोडीव;
जे मजवर उठतात त्यांच्यापासून मला उद्धर.
२ दुष्कर्म करणाऱ्यांपासून मला सोडीव;
घातकी मनुष्यांपासून माझा बचाव कर.
३ पाहा, ते माझा जीव घ्यावयाला टपले आहेत;
हे परमेश्वरा, माझा अपराध किंवा दोष नसतां
दांडगे लोक मजविरुद्ध एकत्र जमले आहेत.
४ माझा दोष नसतां ते धावून सज्ज होत आहेत;
माझें साहाय्य करावें म्हणून तूं जागा होऊन पाहा.
५ हे परमेश्वरा, सेनाधीश देवा, इस्राएलाच्या देवा,
तूं सर्व राष्ट्रांची झडती घेण्यास जागृत हो;
कोणाहि दगेखोर दुष्टावर दया करूं नको. [ सेला ]
६ संध्याकाळीं ते माघारीं येतात,
कुत्र्याप्रमाणें गुरगुरतात व नगराभोंवतीं हिंडतात.
७ पाहा, ते आपल्या मुखावाटे दुष्ट उद्गार काढितात;
त्यांच्या तोंडांत तरवारी आहेत;
कारण ऐकतो कोण? असें ते म्हणतात.
८ परंतु हे परमेश्वरा, तूं त्यांस हंसशील;
तूं सर्व राष्ट्रांचा उपहास करिशील.
९ हे माझ्या सामर्थ्या, मी तुझी अपेक्षा करीन;
कारण देवच माझा उंच गड आहे.
१० माझा देव मला प्रेमळपणानें भेटेल;
देव माझ्या शत्रूंच्या बाबतींत माझ्या डोळ्यांचें
पारणें फेडील.
११ त्यांस जिवें मारूं नको, मारिलें तर माझ्या लोकांस
विसर पडेल;
हे प्रभू, तूं आमची ढाल आहेस; आपल्या बलानें
त्यांची दाणादाण कर, त्यांस खालीं पाड.
१२ त्यांच्या तोंडचें पातक, त्यांच्या मुखांतील शब्द,
त्यांनीं उच्चारलेले शाप व लबाडी,
ह्यांमुळें ते आपल्या गर्वांत गुरफटून जावोत.
१३ कोपानें त्यांचा संहार कर;
ते नाहींतसे होत तोंपर्यंत त्यांचा संहार कर;
देव याकोबावर व पृथ्वीच्या दिगंतापर्यंत सत्ता-
धारी आहे
अशी त्यांची खातरी होवो. [ सेला ]
१४ संध्याकाळीं ते माघारीं येवोत,
कुत्र्याप्रमाणें गुरगुरोत व नगराभोंवतीं हिंडोत.
१५ ते अन्नासाठीं भटकत फिरतात;
त्यांची तृप्ति झाली नाहीं तर सारी रात्र राहतात.
१६ मी तर तुझ्या सामर्थ्याची कीर्ति गाईन,
पहाटेस तुझ्या दयेचा गजर करीन;
कारण माझ्या संकटाच्या समयीं
तूं मला उंच गड व शरणस्थान असा झाला आहेस.
१७ हे माझ्या सामर्थ्या, मी तुझें सुस्वर भजन करीन;
कारण देव माझा उंच गड, माझा दयामय देव आहे.

६० [ मुख्य गवयासाठीं; शूशन एदुथ ( साक्षीचें भूकमल ) या चालीवर शिक्षणासाठीं गावयाचें मिक्ताम नांवाचें दाविदाचें स्तोत्र. तो अराम-नहराईम व अराम-सोबा यांशीं लढाई करीत असतां यवाबानें परत जाऊन क्षाराच्या खोऱ्यांत अदोमांतले बारा हजार पुरुष मारिले तेव्हां रचिलेलें ]

१ हे देवा, तूं आमचा त्याग केला आहे, आमची
दाणादाण केली आहे;
तूं कोपायमान झाला आहेस;
तूं आम्हांस पूर्व स्थितीवर आण.
२ तूं भूमि कंपित केली आहे,
ती विदारिली आहे;
तिचीं भगदाडें भरून काढ, कारण ती डळमळत
आहे.
३ तूं आपल्या लोकांस कठीण प्रसंग दाखविला आहे;
तूं आम्हांला जणूं काय झोकांडे खावयास लावणारा
द्राक्षारस पाजिला आहे;

४ तुझें भय बाळगणाऱ्यांस तूं पताका दिली आहे;
सत्यासाठीं की ती सत्याकरितां फडकावी. [सेला]
५ तुझ्या प्रिय जनांनीं मुक्त व्हावें,
म्हणून तूं आपल्या उजव्या हातानें त्यांचें तारण कर
आणि आमचें ऐक.
६ देव आपल्या पवित्रतेला स्मरून म्हणाला कीं, मी उल्लासेन;
मी शखेम विभागीन व सुक्कोथाचें खोरें मापून देईन;
७ गिलाद माझा आहे व मनश्शे माझा आहे;
एफ्राईम माझें शिरस्त्राण आहे;
यहूदा माझा राजवेत्र आहे;
८ मवाब माझें स्नानाचें घंगाळ आहे;
अदोमावर मी आपलें पायतण फेकीन;
हे पलेशेथा, मजमुळें तूं जयघोष कर.
९ मला तटबंदीच्या नगरांत कोण नेऊन आणील ?
अदोमांत मला कोण नेईल ?
१० हे देवा, तूं आमचा त्याग केलास ?
हे देवा, तूं आमच्या सैन्याबरोबर चालत नाहींस.
११ शत्रूपासून तूं आमची सुटका कर;
मनुष्याचें साहाय्य केवळ व्यर्थ आहे.
१२ देवाच्या साहाय्यानें आम्ही पराक्रम करूं,
तोच आमच्या शत्रूंस तुडवून टाकील.

## ६१

[मुख्य गवयासाठीं; तंतुवाद्याच्या साथीनें गावयाचें दाविदाचें स्तोत्र]

१ हे देवा, माझा धावा ऐक;
माझ्या प्रार्थनेकडे लक्ष दे.
२ माझें मन व्याकुळ झालें असतां पृथ्वीच्या सीमेपासूनहि
मी तुझा धावा करितों;
जो खडक मला दुर्गम आहे त्यावर मला ने.
३ तूं माझा आश्रय, वैऱ्यापासून रक्षण्यास बळकट दुर्ग,
असा होत आला आहेस.
४ तुझ्या मंडपांत मी सर्वकाळ राहीन;
मी तुझ्या पंखांच्या छायेचा आश्रय करीन. [सेला]
५ कारण, हे देवा, तूं माझ्या नवसाची प्रार्थना ऐकली आहे;
तुझ्या नामाचें भय धरणाऱ्यांचें वतन तूं मला दिलें आहे;
६ तूं राजाला दीर्घायु कर;
त्याच्या आयुष्याचीं वर्षें कैक पिढ्यांच्या वर्षांइतकीं होवोत.
७ तो देवासमोर चिरकाल राहो;
तुझें वात्सल्य व सत्य त्याचें रक्षण करितील असें कर;
८ म्हणजे तुझ्या नामाचीं स्तोत्रें निरंतर गाऊन
मी आपले नवस नित्य फेडीत राहीन.

## ६२

[मुख्य गवयासाठीं; यदुथूनाच्या पद्धतीप्रमाणें दाविदाचें स्तोत्र]

१ माझ्या जिवाची भिस्त केवळ देवावर आहे;
त्याजपासून मला तारणप्राप्ति होते.
२ तोच केवळ माझा दुर्ग, तोच माझें तारण आहे;
तो माझा उंच गड आहे; मी सहसा ढळणार नाहीं.
३ एकट्या मनुष्याला मारण्याकरितां त्याजवर तुम्ही सर्व कोठवर चढाई करून याल ?
तो झुकलेल्या भिंतीसारखा, कोसळलेल्या कुंपणासारखा आहे.
४ त्याच्या उच्च पदावरून त्याला ढकलण्याकरितां मात्र ते मसलत करितात;
त्यांस लबाडी आवडते;
ते आपल्या तोंडानें आशीर्वाद देतात,
पण अंतर्यामीं शाप देतात. [सेला]
५ हे माझ्या जिवा, तूं केवळ देवावर भिस्त टाकून स्वस्थ राहा;
कारण माझी आशातृप्ति करणारा तो आहे.
६ तोच केवळ माझा खडक, तोच माझें तारण आहे,
तोच माझा उंच गड आहे; मी ढळणार नाहीं.
७ माझें तारण व माझें वैभव देवसहवासांत आहे;
माझ्या बळाचा दुर्ग, माझा आश्रय देवच आहे;

८ अहो लोकहो, सर्वदा त्याजवर भाव ठेवा;
त्याजपुढें आपलें मन मोकळें करा;
देव आमचा आश्रय आहे. [ सेला ]
९ मानवप्राणी केवळ वाफ आहेत; ते केवळ मिथ्या आहेत;
ताजव्यांत घातलें असतां ते हलके भरतील;
ते सर्व वाफच आहेत.
१० जुलुमजबरीवर भिस्त ठेवूं नका,
लूट केल्याची शेखी मिरवूं नका;
संपत्ति वाढली तरी तिच्यावर चित्त ठेवूं नका.
११ देव एक गोष्ट बोलला आहे;
सामर्थ्य देवाचें आहे; हें मीं दोनदा ऐकलें आहे.
१२ शिवाय हे प्रभू, तुझ्याच ठायीं वात्सल्य आहे;
कारण प्रत्येकाला त्याच्या कृतीप्रमाणें तूं प्रतिफल देतोस.

## ६३

[ यहूदाच्या रानांत असतांना रचिलेलें दाविदाचें स्तोत्र ]

१ हे देवा, तूं माझा देव आहेस; मी आस्थेनें तुझा शोध करीन;
शुष्क, रुक्ष व निर्जल प्रदेशांत माझा जीव तुजसाठीं तान्हेला होतो,
माझ्या देहालाहि तुझी उत्कंठा लागली आहे.
२ अशा प्रकारें तुझें बळ व वैभव पाहण्यास
पवित्रस्थानीं मीं तुजकडे दृष्टि लाविली आहे.
३ तुझें वात्सल्य जीवनाहून उत्तम आहे;
माझे ओठ तुझें स्तवन करितील.
४ मी जीवंत आहें तोंपर्यंत तुझा धन्यवाद असाच करीन;
तुझ्या नामानें मी आपले हात उभारीन.
५ जसा मज्जेनें व मेदानें व्हावा तसा माझा जीव तृप्त होईल,
आणि माझें मुख हर्षभरित होऊन तुझें स्तवन करील.
६ मी रात्रीं आपल्या अंथरुणावर पडून तुझें स्मरण करितों,
व प्रहरोप्रहरीं तुझें ध्यान करीत असतों.
७ कारण तूं माझें साहाय्य होत आला आहेस,
यास्तव तुझ्या पक्षच्छायेखालीं मी आनंद करीन.
८ माझ्या जिवानें तुझी कास धरिली आहे;
तुझा उजवा हात मला संभाळून धरितो;
९ पण जे माझ्या जिवाचा घात करावयास टपले आहेत
ते पृथ्वीच्या अधोभागीं जातील.
१० तरवारीनें त्यांचा निःपात होईल;
ते कोल्ह्यांकुत्र्यांचें खाद्य होतील.
११ राजा देवाच्या ठायीं हर्ष पावेल;
जो कोणी त्याची शपथ वाहतो तो उत्साह करील;
कारण असत्य बोलणाऱ्यांचें तोंड बंद होईल.

## ६४

[ मुख्य गवयासाठीं; दाविदाचें स्तोत्र ]

१ हे देवा, माझी काकुळतीची वाणी ऐक;
वैऱ्याच्या भयापासून माझ्या जिवाचें रक्षण कर.
२ दुष्टांच्या कटापासून,
दुष्कर्म्यांच्या गुप्त मसलतीपासून मला लपीव.
३ त्यांनीं आपली जीभ तरवारीसारखी पाजविली आहे,
त्यांनीं आपल्या कडू शब्दांचा नेम तिरांसारखा धरिला आहे.
४ सात्त्विकाला एकांतांत पाहून मारावें म्हणून
ते त्याजवर अकस्मात् मारा करितात; ते भीत नाहींत.
५ ते आपला दुष्ट संकल्प दृढ करितात;
पाश गुप्तपणें मांडण्याविषयीं ते कुजबुज करितात;
आम्हांस कोण पाहणार असें ते म्हणतात.
६ ते कुटिल युक्त्या शोधून काढितात;
ते म्हणतात, आपण चतुराईनें युक्ति शोधून काढिली आहे;
प्रत्येकाचें अंतर्याम व हृदय खोल आहे.
७ तरी देव त्यांजवर तीर सोडील;
ते अकस्मात् घायाळ होतील.

८ त्यांचीच जिव्हा त्यांस प्रतिकूल होऊन ते अडखळून
पडतील;
त्यांस पाहणारे सर्व जण डोकें हालवितील.
९ तेव्हां सर्व मनुष्यांस धाक बसेल;
ते देवाची कृति वाखाणितील
व त्याच्या कृतीचा नीट विचार करितील.
१० परमेश्वराच्या ठायीं धार्मिक मनुष्य हर्ष पावेल व
त्याचा आश्रय करील;
सरळ अंतःकरणाचे सर्व जन उल्लास पावतील.

## ६५ [ मुख्य गवयासाठीं; दाविदाचें संगीत स्तोत्र ]

१ हे देवा, सीयोनांत तुझी स्तुति होते;
तुला केलेल्या नवसाची फेड तेथें होते.
२ तूं जो प्रार्थना ऐकतोस
त्या तुजकडे सर्व मानवजाति येते.
३ दुष्कर्मांनीं मला बेजार केलें आहे
तरी तूं आमचे अपराध नाहींतसे करिशील.
४ तुझ्या अंगणांत राहण्यासाठीं ज्याला तूं निवडून
घेतोस
आणि आपल्यासन्निध आणितोस तो धन्य;
तुझ्या घरांतील, तुझ्या मंदिराच्या पवित्रस्थानांतील
उत्तम लाभांनीं आम्ही तृप्त होऊं.
५ हे आमच्या तारणाऱ्या देवा,
पृथ्वीच्या सर्व सीमांचा व दूर द्वीपांतरीं असलेल्यांचा
आधार तूं आहेस;
तूं न्यायाच्या भयंकर कृत्यांनीं आम्हांस उत्तर देतोस.
६ तूं पराक्रमानें कमर बांधून
आपल्या सामर्थ्यानें पर्वत स्थिर ठेवितोस,
७ तूं समुद्रांची गर्जना, त्यांच्या लाटांचा कल्लोळ
व लोकांचा दंगल शमवितोस;
८ म्हणून जे पृथ्वीच्या कडेवर राहतात तेहि तुझ्या
उत्पातांस भितात;
दिवसाचा उदय व अस्त ह्यांच्या द्वारें तूं गजर
करवितोस.
९ तूं पृथ्वीचा समाचार घेऊन ती भिजविली आहे;
तूं तिला बहुत फलद्रूप करितोस;
देवाची नदी जलपूर्ण आहे;
भूमि तयार करून तूं मनुष्यांस धान्य पुरवितोस.
१० तिच्या तासांस तूं भरपूर पाणी देतोस
तिचे उंचवटे सपाट करितोस;
तिला पावसाच्या सरींनीं मऊ करितोस;
तींत उगवलेले अंकुर सफल करितोस.
११ तूं आपल्या प्रसादानें वर्ष भूषित करितोस;
आणि तुझे मार्ग समृद्धिमय झाले आहेत;
१२ रानांतलीं कुरणेंहि समृद्ध होतात;
आणि डोंगरांना उल्लासाचें वेष्टन पडलें आहे.
१३ कुरणें कळपांनीं झाकून गेलीं आहेत;
खोरींहि धान्यानें सुशोभित होऊन गेलीं आहेत;
तीं मोठ्यानें जयजयकार करितात व गातात.

## ६६ [ मुख्य गवयासाठीं; संगीत स्तोत्र ]

१ अहो सर्व पृथ्वीवरील लोकहो,
देवाचा जयजयकार करा.
२ त्याच्या नामाचा महिमा गा,
त्याच्या स्तुत्यर्थ त्याचें गौरव करा.
३ देवाला म्हणा, तुझीं कृत्यें किती भयप्रद आहेत
तुझ्या महाबलेंकरून तुझे वैरी तुला वश होतात.
४ सर्व पृथ्वीवरील लोक तुला नमतील
व तुझीं स्तोत्रें गातील;
तुझ्या नामाचीं स्तोत्रें गातील. [ सेला
५ अहो, या, देवाचीं कृत्यें पाहा;
तो आपल्या कृतींनीं मानवजातीस धाक बसवितो
६ त्यानें समुद्राची कोरडी भूमि केली;
ते नदींतून पायांनीं पार गेले,
तेव्हां आम्ही त्याच्या ठायीं हर्ष पावलों.
७ तो आपल्या सामर्थ्यानें सर्वकाळ सत्ता चालवितो
त्याचे नेत्र राष्ट्रांस निरखून पाहतात;
बंडखोरांनीं आपली मान ताठ करूं नये. [ सेला ]

८ अहो लोकांनो, आमच्या देवाचा धन्यवाद करा,
त्याच्या स्तुतीचा घोष उच्च स्वरानें करा;
९ त्यानेंच आमचा प्राण राखिला,
त्यानें आमचे पाय सरकूं दिले नाहींत.
१० हे देवा, तूं आम्हांस पारखिलें आहे;
रुपें गाळतात तसें तूं आम्हांला गाळून पाहिलें आहे.
११ तूं आम्हांस जाळ्यांत गुंतविलें;
तूं आमच्या कंबरेला भारी ओझें बांधिलें.
१२ तूं मनुष्यांना आमच्या डोक्यांवरून स्वारी करावयास लाविलें;
आम्ही अग्नींत व पाण्यांत सांपडलों,
तरी तूं आम्हांस बाहेर काढून समृद्ध स्थळीं आणिलें.
१३ मी होमार्पणें घेऊन तुझ्या मंदिरांत येईन,
तुला केलेले नवस फेडीन;
१४ संकटांत असतां ते मीं आपल्या ओठांनीं उच्चारिले;
मीं ते आपल्या तोंडानें केले.
१५ पुष्ट पशूंचे होम, मेंढ्यांच्या धूपासहित मी तुला अर्पीन;
बोकडांसह मी गोऱ्हे अर्पीन. [ सेला ]
१६ अहो देवाचें भय धरणारे सर्व जनहो, तुम्ही या, ऐका;
त्यानें माझ्या जिवासाठीं जें केलें आहे तें मी सांगतों.
१७ मीं आपल्या मुखानें त्याचा धावा केला,
माझ्या जिव्हेवर त्याचें स्तवन होतें.
१८ माझ्या मनांत दुष्कर्माचा विचार असता
तर प्रभु माझें न ऐकता;
१९ पण देवानें ऐकलेंच आहे;
माझ्या प्रार्थनेच्या वाणीकडे त्यानें लक्ष दिलें आहे.
२० देवाचा धन्यवाद होवो,
त्यानें माझी प्रार्थना अवमानिली नाहीं,
आपली मजवरची दया त्यानें काढून घेतली नाहीं.

## ६७

[ मुख्य गवयासाठीं; तंतुवाद्यांच्या साथीनें गावयाचें संगीत स्तोत्र ]

१ देवानें आम्हांवर दया करावी व आम्हांस आशीर्वाद द्यावा;
त्यानें आपला मुखप्रकाश आम्हांवर पाडावा; [ सेला ]
२ यासाठीं कीं पृथ्वीवर तुझा मार्ग कळावा,
सर्व राष्ट्रांस तूं सिद्ध केलेलें तारण विदित व्हावें.
३ हे देवा, राष्ट्रें तुझी स्तुति करोत
सर्व राष्ट्रें तुझी स्तुति करोत.
४ राष्ट्रें हर्षोत व जयघोष करोत;
कारण तूं राष्ट्रांचा न्याय सरळपणें करिशील
व पृथ्वीवरील राष्ट्रांला मार्ग दाखविशील. [ सेला ]
५ हे देवा, राष्ट्रें तुझी स्तुति करोत;
सर्व राष्ट्रें तुझी स्तुति करोत.
६ भूमीनें आपला उपज दिला आहे;
देव, आमचा देव, आम्हांस आशीर्वाद देवो.
७ देव आम्हांस आशीर्वाद देवो,
व पृथ्वीच्या सर्व सीमा त्याचें भय धरोत.

## ६८

[ मुख्य गवयासाठीं; दाविदाचें संगीत स्तोत्र ]

१ देवानें उठावें, त्याच्या वैऱ्यांची दाणादाण होवो;
त्याचा द्वेष करणारे त्याजपुढून पळोत.
२ जसा धूर फांकतो तशी त्यांची फांकाफांक कर;
जसें मेण अग्नीपुढें ठेविलें असतां वितळतें
तसे दुष्ट देवापुढें नष्ट होवोत;
३ परंतु धार्मिक हर्षोत, देवापुढें आनंदोत्सव करोत,
हर्षामुळें आनंद करोत.
४ देवाला गीत गा, त्याच्या नामाचें स्तवन करा;
ज्याची स्वारी ओसाड प्रदेशांतून चालली आहे,
त्याच्यासाठीं राजमार्ग तयार करा;
त्याचें नाम परमेश आहे, त्याच्यापुढें आनंदोत्सव करा.
५ पितृहीनांचा पिता, विधवांचा कैवारी
असा देव आपल्या पवित्र निवासस्थानीं आहे.

६ एकटे असलेल्यांस देव कुटुंबवत्सल करितो;
बंदिवानांस बाहेर काढून भाग्यवान् करितो;
परंतु बंडखोर रुक्ष प्रदेशांत राहतात.
७ हे देवा, जेव्हां तूं आपल्या लोकांपुढें चाललास
व रानांतून प्रयाण केलेंस, [ सेला ]
८ तेव्हां भूमि कंपित झाली,
व देवासमोर आकाशांतून पर्जन्यवृष्टि झाली;
देवासमोर, इस्राएलाच्या देवासमोर, सीनाय पर्वत
देखील कंपित झाला.
९ हे देवा, तूं विपुल पर्जन्य पाठवून दिलास;
तुझें वतन कोमेजलें होतें तेव्हां तूं तें सुस्थित केलें.
१० त्यांत तुझी मंडळी राहिली;
हे देवा, तूं आपल्या चांगुलपणानें दीनांसाठीं
बेगमी केली.
११ प्रभु अनुज्ञा देतो;
मंगल वार्ता प्रसिद्ध करणाऱ्या स्त्रियांची मोठी सेना
सिद्ध होऊन म्हणते कीं
१२ सैन्यांचे राजे पळ काढितात, पळ काढितात;
आणि घरीं राहिलेली गृहिणी लूट वांटून घेते.
१३ तुम्ही मेंढवाड्यांमध्यें पडून राहतां काय ?
ज्याचे पंख रुप्यानें व पिसें पिवळ्या सोन्यानें
मंडित आहेत,
अशा कबुतरासारखे तुम्ही आहां ना ?
१४ सर्वसमर्थानें राजांची दाणादाण केली,
तेव्हां सल्मोनावर बर्फ पडतें त्याप्रमाणें झालें.
१५ बाशान पर्वत देवाचा पर्वत आहे,
बाशान पर्वत शिखरांचा पर्वत आहे.
१६ अहो शिखरांच्या पर्वतांनो,
देवाला निवासासाठीं जो पर्वत आवडला
त्याकडे वक्रदृष्टीनें कां पाहतां ?
त्यावर परमेश्वर निश्चयें सदोदित राहील.
१७ देवाचे रथ वीस हजार आहेत,
हजारों हजार आहेत,
प्रभु सीनायवरून पवित्रस्थानीं आला आहे.
१८ तूं उच्चस्थानीं आरोहण केलें आहे;
तूं पाडाव केलेल्यांस कैद करून नेलें आहे;
मनुष्यांमध्यें, बंडखोरांमध्येंहि तुला नजराणे मिळाले
आहेत,
यासाठीं कीं हे परमेशा, देवा, तूं तेथें वास करावा.
१९ प्रभूचा धन्यवाद होवो,
तो प्रतिदिनीं आमचा भार वाहतो;
देव हा आमचें तारण आहे. [ सेला ]
२० देव हा आम्हांला संकटांतून मुक्त करणारा आहे;
आणि मृत्यूपासून सुटण्याचे मार्ग दाखविणें प्रभु
जो परमेश्वर त्याजकडे आहे.
२१ देव निश्चयें आपल्या वैऱ्यांचें मस्तक फोडील,
आपल्या दुष्टाईत निमग्न होऊन चालतो त्याचें
केसाळ माथें फोडील.
२२ प्रभु म्हणाला, बाशानापासून मी त्यांस परत
आणीन,
समुद्राच्या खोल डोहांतून त्यांस परत आणीन;
२३ यासाठीं कीं तूं आपला पाय रक्तांत बुचकळावा,
तुझे शत्रु तुझ्या कुत्र्यांच्या जिभांचें खाद्य व्हावें.
२४ हे देवा, त्यांनीं तुझ्या स्वाऱ्या पाहिल्या आहेत,
पवित्रस्थानीं माझ्या देवाच्या,
माझ्या राजाच्या स्वाऱ्या त्यांनीं पाहिल्या आहेत.
२५ खंजिऱ्या वाजविणाऱ्या कुमारींच्यामध्यें
गाणारे पुढें व वाजविणारे मागें असे चालून
म्हणतात कीं
२६ ज्यांचा उगम इस्राएलापासून आहे असे तुम्ही,
प्रभु जो देव त्याचा, जनसमूहामध्यें धन्यवाद करा.
२७ तेथें त्यांजवर प्रभुत्व करणारा कनिष्ठ बन्यामीन,
यहूदाचे अधिपति, व त्यांच्याबरोबरचे समुदाय,
जबुलूनाचे अधिपति, नफतालीचे अधिपति हे
आहेत.
२८ तूं प्रबळ व्हावें असें तुझ्या देवानें
आज्ञापिलें आहे;
हे देवा, तूं आम्हांसाठीं जें केलें आहे तें दृढ कर.
२९ यरुशलेमांतील तुझ्या मंदिराकरितां
राजे तुला भेटी आणितील.

३० लव्हाळ्यामध्यें राहणारे वनपशु, गोऱ्ह्यांची झुंड
व लोकांचे वत्स यांस धमकाव,
म्हणजे ते रुप्याच्या लगडी आणून तुला
दंडवत घालतील;
युद्धप्रिय लोकांची त्यानें दाणादाण केली आहे.
३१ मिसर देशांतून सरदार येतील;
कूश आपले हात देवाकडे पसरण्याची त्वरा
करील.
३२ अहो पृथ्वीवरील राष्ट्रांनो, तुम्ही देवाला गीत गा;
प्रभूचीं स्तोत्रें गा. [सेला]
३३ पुरातन आकाशाच्या आकाशावर आरूढ होऊन
जो स्वारी करितो, त्याचीं स्तोत्रें गा;
पाहा, तो आपला शब्द, सामर्थ्याचा शब्द
उच्चारितो.
३४ देवाच्या बलाचें वर्णन करा;
इस्राएलावर त्याचें ऐश्वर्य आणि गगनमंडळांत
त्याचें बल आहे.
३५ तुझ्या पवित्र स्थानांतून कार्य करणारा देव भयं-
कर आहे.
इस्राएलाचा देव आपल्या लोकांस
बल व सामर्थ्य देतो.
देवाचा धन्यवाद होवो.

## ६९

[मुख्य गवयासाठीं: शोशन्नीम (भूकमल) या चालीवर गावयाचें दाविदाचें स्तोत्र]

१ हे देवा, मला तार;
कारण जलें माझ्या प्राणाशीं येऊन भिडलीं आहेत.
२ मी खोल दलदलींत रुतलों आहें, तेथें उभें राहण्यास
आधार नाहीं;
मी खोल पाण्यांत आलों आहें, आणि लोंढा मज-
वरून जात आहे.
३ आरोळी मारितां मारितां मी थकलों आहें;
माझा घसा कोरडा पडला आहे;
मी आपल्या देवाची वाट पाहतां पाहतां माझे
डोळे शिणले आहेत.
४ माझा द्वेष विनाकारण करणारे माझ्या डोक्याच्या
केसांपेक्षां अधिक आहेत;
अन्यायानें मजशीं वैर करणारे, माझा जीव घेऊं
पाहणारे, बलिष्ठ आहेत;
मीं हरण केलें नव्हतें तेंहि मला द्यावें लागलें.
५ हे देवा, तूं माझें मूर्खपण जाणतोस;
आणि तुजपुढें माझीं पातकें लपलेलीं नाहींत.
६ हे प्रभू, सेनाधीश परमेश्वरा, जे तुझी अपेक्षा
करितात
त्यांच्या फजितीला मीं कारण होऊं नये;
हे इस्राएलाच्या देवा, जे तुझी प्रतीक्षा करितात
त्यांच्या अप्रतिष्ठेला मीं कारण होऊं नये.
७ कारण तुजकरितां मीं निंदा सोशिली आहे;
लज्जेनें माझें मुख व्याप्त झालें आहे;
८ मी आपल्या भावांस नवखा,
माझ्या सहोदरांस परका असा झालों आहें.
९ कारण तुझ्या मंदिराविषयींच्या आवेशानें मला
ग्रासून टाकिलें आहे,
तुझी निंदा करणाऱ्यांनीं केलेली निंदा मजवर झाली
आहे.
१० मीं उपास करून शोक केला,
तेंच माझ्या निंदेस कारण झालें.
११ मीं गोणताटाचे कपडे चढविले,
तेव्हां मी त्यांच्या उपहासाचा विषय झालों.
१२ वेशींत बसणारे मजविषयीं बोलत असतात,
मी मद्यप्यांच्या गायनाचा विषय झालों.
१३ मी तर, हे परमेश्वरा, तुला मान्य होईल अशा
समयीं तुझी प्रार्थना करितों;
हे देवा, तूं आपल्या विपुल दयेस
व आपण सिद्ध केलेल्या उद्धाराच्या सत्यास अनुस-
रून मला उत्तर दे.
१४ चिखलांतून मला काढ, मला रुतूं देऊं नको;
मला माझ्या द्वेष्ट्यांपासून मुक्त कर व खोल
पाण्यांतून मला काढ.
१५ पाण्याचा लोंढा मजवरून जाऊं देऊं नको;

दलदलींत मला खचूं देऊं नको;
गर्तेच्या जाभाड्यांत मला गुंतून पडूं देऊं नको.
१६ हे परमेश्वरा, माझें ऐक, कारण तुझें वात्सल्य
अनुपम आहे;
आपल्या विपुल करुणेस अनुसरून माझ्याकडे वळ.
१७ आपल्या दासापासून तूं आपलें मुख लपवूं नको;
कारण मी संकटांत आहें; माझें सत्वर ऐक.
१८ माझ्या जिवाजवळ येऊन त्याचा उद्धार कर;
माझे वैरी पाहून माझा उद्धार कर.
१९ माझी निंदा, माझी फजिती आणि माझी अप्रतिष्ठा
तूं जाणतोस;
माझे सर्व शत्रु तुजपुढें आहेत.
२० निंदा होत असल्यामुळें माझें हृदय भग्न झालें आहे;
मी अगदीं बेजार झालों आहें;
माझी कींव करणारा कोणी आहे की काय हें मीं
पाहिलें; पण कोणी आढळला नाहीं;
माझें कोणी समाधान करील म्हणून वाट पाहिली,
पण कोणी दिसला नाहीं.
२१ त्यांनीं मला खावयास अन्न म्हणून विष दिलें,
तहान भागविण्यास मला आंब दिली.
२२ त्यांजपुढें मांडिलेलें ताट त्यांस पाश होवो,
ते निश्चिंत असतां त्यांस तें जाळें होवो.
२३ त्यांस दिसूं नये म्हणून त्यांचे डोळे अंधळे होवोत;
तूं त्यांची कंबर सदा खचीव.
२४ तूं त्यांजवर आपल्या क्रोधाचा मारा कर,
तुझा कोपाग्नि त्यांस गांठो.
२५ त्यांची वस्ती ओसाड पडो,
त्यांच्या डेऱ्यांत कोणी राहावयाला न उरो.
२६ कारण ज्याला तूं शिक्षा केली त्याच्या पाठीस ते
लागतात;
तूं ज्यांस घायाळ केलें आहे त्यांच्या दुःखांत ते
भर घालितात.
२७ त्यांच्या अन्यायांत भर टाक;
तुझ्या न्यायपरायणतेचा लाभ त्यांस न होवो.
२८ जीवनाच्या पुस्तकांतून त्यांचीं नांवें खोडलीं जावोत,
धार्मिकांबरोबर त्यांची नांवनिशी न होवो.
२९ मी तर दीन व दुःखी आहें;
हे देवा, तूं सिद्ध केलेलें तारण मला उच्चस्थानीं
नेऊन ठेवील.
३० देवाच्या नामाचें मी गीत गाऊन स्तवन करीन.
त्याचें उपकारस्मरण करून त्याचा महिमा वर्णीन.
३१ तें बैलापेक्षां, शिंगें असलेल्या व दुभागलेल्या
खुरांच्या गोऱ्ह्यापेक्षां परमेश्वराला आवडेल.
३२ दीन हें पाहून हर्षतील;
देवाचा शोध करणाऱ्यांनो,
तुमच्या हृदयांत नवजीवन येवो.
३३ कारण परमेश्वर दरिद्र्यांचें ऐकतो;
बंदींत पडलेल्या आपल्या लोकांचा तो अव्हेर
करीत नाहीं.
३४ आकाश, पृथ्वी, समुद्र
व त्यांत चलनवलन करणारे सर्व प्राणी त्याचें
स्तवन करोत.
३५ कारण देव सीयोनाचें तारण करील,
तो यहूदाचीं नगरें बांधील;
लोक तेथें राहतील व तें त्यांच्या ताब्यांत येईल.
३६ तें त्याच्या दासांच्या संततीचेंहि वतन होईल;
ज्यांस त्याचें नाम प्रिय आहे ते त्यांत वस्ती
करितील.

## ७० [ मुख्य गवयासाठीं; दाविदाचें स्मरणार्थ स्तोत्र ]

१ हे देवा, प्रसन्न होऊन मला मुक्त कर;
हे परमेश्वरा, माझें साहाय्य करण्यास त्वरा कर.
२ जे माझा जीव घ्यावयास पाहतात
ते लज्जित व फजीत होवोत,
माझे विघ्नसंतोषी मागें हटून अप्रतिष्ठा पावोत.
३ अहाहा ! अहाहा ! असें थट्टेनें म्हणणाऱ्यांची
फजिती होऊन
ते लज्जेनें मागें हटोत.
४ तुला शरण येणारे सर्व तुझ्या ठायीं आनंद व
उल्लास पावोत;

ज्यांना तूं सिद्ध केलेल्या तारणाची आवड वाटते ते,
देवाचा महिमा वाढो, असें सतत म्हणोत.
मी तर दीन व दरिद्री आहें.
हे देवा, मजकडे येण्याची त्वरा कर;
माझा साहाय्यकर्ता व माझा मुक्तिदाता तूं आहेस;
हे परमेश्वरा, विलंब लावूं नको.

**७१** १ हे परमेश्वरा, मीं तुझा आश्रय धरिला
आहे;
मीं कधीं लज्जित होऊं नये.
तूं आपल्या न्यायाचारानें मला उद्धर व मुक्त कर;
मजकडे आपला कान लाव व माझें तारण कर;
मला नेहमीं थारा सांपडावा म्हणून मजसाठीं
निवासाचा खडक हो;
मला तारण्याचें तूं ठरविलें आहे,
कारण तूं माझा गड व दुर्ग आहेस.
हे माझ्या देवा, दुर्जनाच्या हातांतून मला मुक्त
कर,
अन्यायी व निर्दय यांच्या तावडींतून मुक्त कर.
कारण, हे प्रभू परमेश्वरा, तूं माझें आशास्थान
आहेस;
माझ्या तरुणपणापासून तूं माझें श्रद्धास्थान आहेस.
जन्मापासून तूं माझा आधार आहेस;
मातेच्या उदरांतून निघाल्यापासून तूं माझा
कल्याणकर्ता आहेस;
मी तुझी स्तुति निरंतर करीन.
७ बहुतांस मी आश्चर्याचा विषय झालों आहें;
तरी तूं माझा खंबीर आश्रय आहेस.
८ माझ्या मुखांत तुझें स्तुतिस्तोत्र सदा असत जाईल;
त्यांतून दिवसभर गौरवपर शब्द निघतील.
९ उतार वयांत माझा त्याग करूं नको;
माझी शक्ति क्षीण होत चालली असतां
मला सोडूं नको.
१० कारण माझे वैरी मजविषयीं चर्चा करितात
आणि माझ्या जिवावर टपणारे एकत्र मिळून
मसलत करितात.
११ ते म्हणतात, देवानें याला सोडिलें आहे;
याच्या पाठीस लागा, याला धरा;
कारण याला सोडविणारा कोणी नाहीं.
१२ हे देवा, मजपासून दूर असूं नको;
हे माझ्या देवा, माझ्या साहाय्यासाठीं त्वरा कर.
१३ माझ्या जिवाला अपाय करणारे लज्जित होऊन
नष्ट होवोत;
माझें अनिष्ट करावयास पाहणारे निंदेनें व
अप्रतिष्ठेनें व्याप्त होवोत.
१४ मी तर नित्य आशा धरून राहीन
आणि तुझें स्तवन अधिकाधिक करीत जाईन.
१५ माझें मुख तुझ्या न्यायपरायणतेचें
आणि तूं सिद्ध केलेल्या तारणाचें दिवसभर वर्णन
करील; त्यांची गणती मला कळत नाहीं.
१६ प्रभु परमेश्वराच्या महत्कृत्यांचें मी वर्णन
करीत येईन;
तुझ्या, केवळ तुझ्याच, न्याय्यत्वाचें मी
निवेदन करीन.
१७ हे देवा, माझ्या तरुणपणापासून तूं मला शिकवीत
आला आहेस;
आणि मीं आजपर्यंत तुझीं अद्भुतकृत्यें
वर्णिलीं आहेत.
१८ मी वयोवृद्ध होऊन माझे केस पिकले
तरी हे देवा, मला सोडूं नको;
म्हणजे मी भावी पिढीला तुझें बाहुबल
विदित करीन,
पुढच्या पिढींतील सर्वांस तुझ्या पराक्रमाचें
वर्णन करीन.
१९ हे देवा, तुझें न्याय्यत्व गगनापर्यंत पोहोंचलें आहे;
हे देवा, तूं महत्कृत्यें केलीं आहेत, तुजसमान
कोण आहे ?
२० तूं आम्हांला बहुत व भारी संकटें भोगावयास
लाविलीं,
तरी तूं आमचें पुनरुज्जीवन करिशील,

आणि पृथ्वीच्या अधोभागांतून पुनः वर आणिशील.
२१ तूं माझें महत्त्व वाढीव
आणि मजकडे वळून माझें सांत्वन कर.
२२ मी तर तुझें स्तुतिस्तोत्र सतारीवर गाईन,
हे माझ्या देवा, तुझ्या सत्याचें स्तवन करीन;
हे इस्राएलाच्या पवित्र प्रभू, मी वीणेवर
तुझीं स्तोत्रें गाईन.
२३ मी तुझीं स्तोत्रें गातांना माझे ओठ आनंदानें गजर करितील;
तूं मुक्त केलेला माझा जीव आनंदानें गजर करील.
२४ माझी जिव्हा दिवसभर तुझ्या न्यायत्वाविषयीं गुणगुणत राहील;
कारण माझें वाईट करावयास पाहणारे लज्जित व फजीत झाले आहेत.

## ७२ [ शलमोनाचें स्तोत्र ]

१ हे देवा, तूं आपलें न्यायानुशासन राजाला दे,
राजपुत्राला आपली धर्मनीति शिकीव.
२ तो नीतीनें तुझ्या लोकांचा न्याय करील,
तुझ्या दीनांचा निवाडा न्यायबुद्धीनें करील.
३ पर्वत व डोंगर नीतीच्या द्वारें
लोकांस शांतिदायक होतील.
४ तो प्रजेंतल्या दीनांचा न्याय करील;
तो दरिद्री जनांच्या मुलांबाळांचें तारण करील,
तो जुलूम करणाऱ्यांस चिरडून टाकील.
५ चंद्र सूर्य आहेत तोंपर्यंत
ते पिढ्यानुपिढ्या तुझें भय धरितील.
६ कापलेल्या गवतावर पडणाऱ्या पर्जन्याप्रमाणें,
भूमि सिंचन करणाऱ्या सरींप्रमाणें तो उतरेल.
७ त्याच्या काळीं धार्मिक उत्कर्ष पावतील;
आणि चंद्र नाहींसा होईपर्यंत विपुल शांति असेल.
८ समुद्रापासून समुद्रापर्यंत
आणि त्या नदीपासून पृथ्वीच्या दिगंतापर्यंत
त्याची सत्ता होईल.
९ अरण्यांतले रहिवासी त्याला नमन करितील;
त्याचे वैरी धूळ चाटितील.
१० तार्शीश व द्वीपें यांचे राजे नजराणे आणितील.
शबा व सबा यांचे राजे खंडणी देतील.
११ सर्व राजे त्याला दंडवत घालितील;
सर्व राष्ट्रें त्याची सेवा करितील.
१२ कारण धावा करणारा दरिद्री,
दीन व अनाथ, यांला तो सोडवील.
१३ दुबळा व दरिद्री यांजवर तो दया करील,
दरिद्र्यांचे जीव तो तारील.
१४ जुलूम व बलात्कार यांपासून त्यांचे जीव तो मुक्त करील;
आणि त्याच्या दृष्टीनें त्यांचें रक्त अमोल ठरेल;
१५ तो चिरायु होवो व त्याला शबाचें सोनें मिळो;
त्याजसाठीं सतत प्रार्थना केली जावो;
त्याचा धन्यवाद दिवसभर होवो.
१६ भूमीवर पर्वतांच्या शिखरांपर्यंत भरपूर पीक येवो;
त्याचीं कणसें लबानोनाप्रमाणें डोलोत;
नगरोनगरांचे लोक पृथ्वीवरील तृणाप्रमाणें
विपुल होवोत.
१७ त्याचें नाम सर्वकाळ राहो;
सूर्य आहे तोंवर त्याचें नाम वृद्धिंगत होवो;
त्याच्या नामानें लोक आपणांस धन्य म्हणोत;
सर्व राष्ट्रें त्याचा धन्यवाद करोत.
१८ परमेश्वर देव, इस्राएलाचा देव, तोच कायतो अद्भुत कृत्यें करितो;
त्याचा धन्यवाद होवो.
१९ त्याचें गौरवयुक्त नाम सदा सुवंदित असो;
त्याच्या महिम्यानें सर्व पृथ्वी भरो.
आमेन, आमेन.

[ इशायाचा पुत्र दावीद याच्या प्रार्थना समाप्त ]

# भाग तिसरा

## ७३ [ आसाफाचें स्तोत्र ]

१ देव इस्राएलावर, शुद्ध मनाच्या लोकांवर,
खरोखर कृपा करणारा आहे.
२ मजविषयीं म्हणाल तर माझे पाय लटपटण्याच्या
लागास आले होते;
माझीं पावलें बहुतेक घसरणार होतीं.
३ कारण दुर्जनांचा उत्कर्ष पाहून
मी गर्विष्ठांचा हेवा करूं लागलों.
४ त्यांस मरणयातना नसतात,
ते शरीरानें धडधाकट व पुष्ट असतात;
५ मानवजातीप्रमाणें त्यांना क्लेश होत नसतात,
इतर मनुष्यांप्रमाणें त्यांस पीडा होत नसतात;
६ म्हणून अहंकार हा त्यांच्या कंठींचा हार बनला
आहे.
बलात्कार हा त्यांस वस्त्राप्रमाणें आच्छादन
झाला आहे.
७ पुष्टतेमुळें त्यांचे डोळे बाहेर येतात;
त्यांच्या मनांतील कल्पना उचंबळतात.
८ ते थट्टा करितात, व दुष्टतेनें जुलमाच्या
गोष्टी बोलतात;
ते मोठ्या डौलानें भाषण करितात.
९ ते आपलें तोंड आकाशापर्यंत पोंचवितात;
त्यांची जीभ पृथ्वीवर मिरविते.
१० यामुळें त्यांचे लोक त्यांजकडे वळतात,
आणि त्यांच्याजवळचें पाणी भरपूर पितात;
११ आणि म्हणतात, देवाला कसें समजणार ?
परात्पराला काय ज्ञान आहे ?
१२ पाहा, दुर्जन ते हेच;
हे स्वस्थ असून सर्वदा धनवृद्धि करीत असतात.
१३ मीं आपलें मन स्वच्छ राखिलें,
आपले हात निर्दोषतेनें धुतले, हें सगळें व्यर्थ;
१४ कारण मीं दिवसभर पीडा भोगिली आहे;
प्रतिदिवशीं सकाळीं मला शिक्षा झाली आहे.
१५ याप्रमाणें बोलण्याचें मीं मनांत आणिलें असतें,
तर मी तुझ्या प्रजेच्या पिढ्यानुपिढीचा गुन्हेगार
ठरलों असतों.
१६ ही गोष्ट मला समजावी म्हणून तिचा विचार
करूं लागलों.
तों ती मला दुःखदायक वाटली;
१७ पण मी देवाच्या पवित्र स्थानांत गेलों
आणि त्या लोकांचा शेवट मनांत आणिला तेव्हां
ती मला समजली.
१८ खचीत तूं त्या लोकांस निसरड्या स्थलांवर
उभे करितोस,
त्यांस पाडून त्यांचा नाश करितोस.
१९ एका क्षणांत त्यांची कशी धूळधाण झाली आहे!
भयानें ते अगदीं गांगरून गेले आहेत;
२० जागा झालेला मनुष्य जसें स्वप्न कांहींच नाहीं
असें मानितो,
तसा हे प्रभू, तूं जागा होतांच त्यांचें तें रूप
तुच्छ मानितोस.
२१ माझें मन खिन्न झालें
व माझें अंतर्याम व्यथित झालें.
२२ मी तर मूढ व अज्ञानी होतों;
तुजपुढें मी पशुतुल्य होतों.
२३ तरी मी नेहमीं तुजजवळ आहें;
तूं माझा उजवा हात धरिला आहे.
२४ तूं बोध करून मला मार्ग दाखविशील
आणि तदनंतर गौरवानें माझा स्वीकार करिशील.
२५ स्वर्गांत तुजशिवाय मला कोण आहे ?
पृथ्वीवर मला तुजशिवाय दुसरा कोणीहि प्रिय नाहीं.
२६ माझा देह व माझें हृदय हीं खचलीं;
तरी देव सर्वकाळ माझ्या जिवाचा आधार व
माझा वांटा आहे.
२७ पाहा, जे तुजपासून दूर जातात ते नष्ट होतात.

अनाचार करून बहकून जाणाऱ्या सर्वांचा तूं समूळ नाश करितोस.
२८ मजविषयीं म्हटलें तर देवासमीप जाणें यांतच माझें कल्याण आहे;
मीं प्रभु परमेश्वराला आपलें आश्रयस्थान केलें आहे,
यासाठीं कीं मीं तुझीं सर्व कृत्यें जाहीर करावीं.

## ७४ [आसाफाचें मास्कील (बोधपर स्तोत्र)]

१ हे देवा, तूं आम्हांस कां कायमचें टाकिलें आहे?
आपल्या कुरणांतल्या कळपावर तुझा कोपाग्नि कां धुमसतो?
२ जी मंडळी पुरातन काळीं तूं विकत घेतली,
जिला तूं आपले वारस होण्याकरितां उद्धरिलें तिचें,
व ज्या सीयोन पर्वतावर तूं वस्ती केली त्याचें स्मरण कर.
३ सर्वस्वी विध्वंस झालेल्या स्थलाकडे पाय उचलून चल;
वैऱ्यानें पवित्रस्थानाची अगदीं नासाडी केली आहे.
४ तुझ्या सभागृहांत तुझ्या शत्रूंनीं हलकल्लोळ मांडिला आहे;
त्यांनीं आपले ध्वज चिन्हांसाठीं उभारिले आहेत.
५ दाट झाडीवर कुऱ्हाडी उचलणाऱ्या लोकांसारखे ते दिसले.
६ त्यांचें एकंदर नकशीकाम
ते कुऱ्हाडीनें व हातोड्यांनीं फोडून टाकितात.
७ त्यांनीं तुझ्या पवित्रस्थानाला आग लाविली आहे;
तुझ्या नामाचें निवासस्थान भ्रष्ट करून अगदीं धुळीस मिळविलें आहे.
८ ते आपल्या मनाशीं म्हणाले,
आपण यांचा नायनाट करून टाकूं;
त्यांनीं देशांत असलेलीं देवाचीं सर्व सभास्थानें जाळून टाकिलीं आहेत.
९ आमचीं चिन्हें आमच्या दृष्टीस पडत नाहीत;
कोणी संदेष्टा उरला नाहीं;
आणि असें कोठवर चालेल हें जाणणारा आमच्यामध्यें कोणी नाहीं.
१० हे देवा, शत्रु कोठवर निंदा करणार?
वैरी तुझ्या नामाची निर्भर्त्सना सदा करणार काय?
११ तूं आपला हात, म्हणजे आपला उजवा हात, कां आवरून धरितोस?
तो आपल्या छातीवरून काढून तूं त्यांचा संहार कर.
१२ देव माझा पुरातन कालापासूनचा राजा आहे;
पृथ्वीवर उद्धार करणारा तो आहे.
१३ तूं आपल्या सामर्थ्यानें समुद्र दुभागिला;
जलाशयांतील मगरांचीं मस्तकें तूं ठेचून टाकिलीं.
१४ तूं लिव्याथानाच्या मस्तकांचा चुराडा केला,
वनचरांना तो तूं खाऊं घातला.
१५ तूं झरा फोडून जलप्रवाह बाहेर काढिला;
तूं निरंतर वाहणाऱ्या नद्या सुकवून टाकिल्या.
१६ दिवस तुझा आहे, रात्रहि तुझीच आहे;
चंद्र व सूर्य तूं स्थापन केले.
१७ पृथ्वीच्या सर्व सीमा तूंच ठरविल्या;
उन्हाळा व हिंवाळा हे तूंच केले.
१८ हे परमेश्वरा, लक्षांत असूं दे कीं वैऱ्यानें कशी विटंबना मांडिली आहे,
मूर्ख राष्ट्रानें तुझ्या नामाची कशी निंदा चालविली आहे.
१९ तूं आपल्या कपोताला श्वापदापुढें टाकूं नको;
आपल्या दीनजनांच्या प्राणांचा विसर कायमचा पडूं देऊं नको.
२० तूं कराराकडे लक्ष दे;
कारण देशाचे कोनेकोपरे केवळ बलात्काराचीं स्थानें झालीं आहेत.
२१ पीडितास लज्जित होऊन मागें फिरूं देऊं नको;
दीन व दरिद्री तुझ्या नामाची स्तुति करोत.
२२ हे देवा, ऊठ, तूं आपणच आपला वाद चालीव;
मूर्ख तुझी निंदा कशी नित्य करीत आहे हें लक्षांत आण.
२३ शत्रूंची आरडाओरड,
तुजावर उठणाऱ्यांचा एकसारखा वर चढणारा गोंगाट विसरूं नको.

७५ [मुख्य गवयासाठीं; ताश्केथ (नष्ट करूं नको) या चालीवर गावयाचें आसाफाचें संगीत स्तोत्र]

१ हे देवा, आम्ही तुझें उपकारस्मरण करितों;
तुझें उपकारस्मरण करितों,
कारण तुझें नाम समीप आहे;
तुझ्या अद्भुत कृत्यांचें वर्णन लोक करितात.
२ नेमिलेली वेळ आली म्हणजे
मी यथार्थ न्याय करीन.
३ पृथ्वी व तिच्यावर सर्व राहणारे भेदरून गेले
तरी तिचे स्तंभ मींच स्थापिले आहेत. [सेला]
४ फुशारकी मारणाऱ्यांस मी म्हणालों, फुशारकी मारूं नका;
आणि दुर्जनांस म्हणालों, शिंग वर करूं नका;
५ तुम्ही आपलें शिंग उंच करूं नका;
ताठ मानेनें बोलूं नका.
६ कारण उन्नति ही पूर्वेकडून नव्हे,
पश्चिमेकडून नव्हे, व अरण्याकडूनहि नव्हे;
७ तर न्याय करणारा देव आहे;
तो एकाला खालीं घालितो व दुसऱ्याला वर आणितो.
८ पाहा, परमेश्वराच्या हातीं प्याला आहे व त्यांत द्राक्षारस फेसाळत आहे;
त्यांत मसाला मिसळला आहे आणि त्यांतून तो ओतून देतो;
त्याचा गाळ पृथ्वीवरील सर्व दुर्जनांस खातरीनें निथळून प्यावा लागेल.
९ मी तर सदा आनंद करीन,
याकोबाच्या देवाचीं स्तोत्रें गाईन.
१० दुर्जनांचीं सर्व शिंगें मी तोडून टाकीन;
पण धार्मिकांचीं शिंगें उन्नत होतील.

७६ [मुख्य गवयासाठीं; तंतुवाद्यांच्या साथीनें गावयाचें आसाफाचें संगीत स्तोत्र]

१ यहूदांत देव प्रगट झाला आहे;
इस्राएलांत त्याचें नाम थोर आहे.
२ शालेमांत त्याचा मंडप आहे;
व सीयोनांत त्याचें निवासस्थान आहे.
३ तेथें धनुष्याचे बाण,
ढाल, तरवार व युद्धसामग्री हीं त्यानें मोडून टाकिलीं. [सेला]
४ तूं प्रतापी आहेस,
लुटीनें भरलेल्या पर्वतावर तेजस्वी आहेस.
५ जातीच्या धैर्यवानांना लुबाडिलें आहे, ते झोंपीं गेले आहेत;
त्यांतील कोणाहि बलवानाचे हात चालेनात.
६ हे याकोबाच्या देवा, तुझ्या धमकीनें रथ व घोडा यांना गाढ निद्रा लागली आहे.
७ तुझें, तुझेंच, भय धरिलें पाहिजे;
तुला एकदा क्रोध आला म्हणजे तुजपुढें कोण उभा राहील?
८ तूं स्वर्गांतून आपला निर्णय ऐकविला;
तों पृथ्वी भ्याली व स्तब्ध झाली;
९ पृथ्वीवरील सर्व दीनांस तारावयासाठीं,
न्यायनिवाडा करावयासाठीं देव उठला,
तेव्हां असें झालें. [सेला]
१० कारण मनुष्याचा क्रोध तुझ्या स्तुतीचें साधन असा होतो;
अवशिष्ट क्रोधानें तूं आपली कमर बांधितोस.
११ परमेश्वर तुमचा देव याला नवस करा व ते फेडा;
त्याचें भय धरिलें पाहिजे त्याला त्याच्या समोवतालच्या सर्वांनीं नजराणे आणावे.
१२ अधिपतींचा संताप तो नष्ट करितो;
पृथ्वीवरील राजांस तो भयप्रद आहे.

७७ [मुख्य गवई यदूथून याच्यासाठीं आसाफाचें स्तोत्र]

१ मी आपल्या वाणीनें देवाला हाक मारीन;
मी देवाला हाक मारीन व तो माझें ऐकेल.

२ माझ्या संकटाच्या दिवशीं मी प्रभूला शरण गेलों;
रात्रीं माझा हात पसरलेला राहिला,
तो ढिला पडला नाहीं;
माझा जीव सांत्वन पावेना.
३ मी देवाचें स्मरण करून करून व्याकुळ होतों;
मी ध्यान करूं इच्छितों पण माझा जीव
मूर्च्छित होतो. [ सेला ]
४ तूं माझ्या पापणीस पापणी लागूं देत नाहींस;
मी विव्हळ झालों आहें, मला बोलवत नाहीं.
५ पूर्वीचे दिवस व प्राचीन काळचीं वर्षे
हीं मीं ध्यानांत आणिलीं आहेत.
६ रात्रीं मला आपल्या गीताचें स्मरण होतें;
मी आपल्या मनांत चिंतन करितों;
माझा जीव विचारांत पडला आहे कीं
७ प्रभु सर्वकाळ आमचा त्याग करील काय ?
तो पुनः कधीं प्रसन्न होणार नाहीं काय ?
८ त्याची दया कायमची नाहींशी झाली काय ?
त्याचें अभिवचन पिढ्यानुपिढ्या निष्फळ
राहणार काय ?
९ देव कृपा करावयाचें विसरला काय ?
त्यानें क्रोधामुळें आपला कळवळा आवरून
धरिला काय ? [ सेला ]
१० मी म्हणालों, ही तर केवळ माझी दुर्बलता आहे;
परंतु मी परात्पराच्या उजव्या हातच्या वर्षांचें
स्मरण करीन.
११ मी परमेशाचीं महत्कृत्यें वर्णीन;
आणि मी तुझ्या पुरातन कालच्या अद्भुत कृत्यांचें
स्मरण करीन.
१२ मी तुझ्या सर्व कृत्यांचें मननहि करीन
आणि तुझ्या कार्यांचा विचार करीन.
१३ हे देवा, तुझा मार्ग पवित्रतेचा आहे;
परमेश्वरासारखा थोर देव कोण आहे ?
१४ अद्भुत कृत्यें करणारा तूंच देव आहेस;
तूं आपलें सामर्थ्य लोकांत प्रगट केलें आहे.
१५ याकोब व योसेफ यांची संतति म्हणजे तुझे लोक
यांस तूं आपल्या भुजानें मुक्त केलें आहे. [ सेला ]
१६ जलांनीं तुला पाहिलें, हे देवा, जलांनीं तुला पाहिलें;
तीं कंपित झालीं, जलाशयहि खळबळले.
१७ मेघांनीं वर्षाव केला;
आभाळ कडाडलें;
तुझे बाणहि सुटले.
१८ तुझ्या गर्जनेचा शब्द झंझावातांत होता;
विजांचा पृथ्वीवर चकचकाट झाला;
भूमि कंपित होऊन डळमळली.
१९ समुद्रांत तुझा माग
व महाजलांत तुझ्या वाटा होत्या,
तुझीं पावलें दिसलीं नाहींत.
२० मोशे व अहरोन यांच्या हस्तें
तूं आपले लोक कळपाप्रमाणें नेले.

## ७८ [ आसाफाचें मास्कील ( बोधपर स्तोत्र ) ]

१ अहो माझे लोकहो, माझ्या धर्मशास्त्राकडे लक्ष द्या;
माझ्या तोंडच्या वचनांकडे कान लावा.
२ मी आपलें तोंड उघडून दृष्टांत सांगेन;
प्राचीन काळच्या गूढकथांचें निवेदन करीन.
३ जें आम्हीं ऐकलें, जें आम्हांला समजलें,
जें आमच्या वडिलांनीं आम्हांस सांगितलें,
४ तें आम्ही त्यांच्या वंशजांपासून गुप्त ठेवणार नाहीं;
तर पुढल्या पिढीला परमेश्वराचीं स्तुत्य कृत्यें,
त्याचा पराक्रम आणि त्यानें केलेलीं अद्भुत कृत्यें
यांचें वर्णन करूं.
५ त्यानें याकोबवंशाला निर्बंध,
इस्राएलवंशाला नियम लावून दिला;
त्यानें आमच्या वडिलांस आज्ञा केली कीं त्यांनीं ते
आपल्या वंशजांस शिकवावे,
६ आणि पुढल्या पिढीनें, म्हणजे पुढें जन्मास
येणाऱ्या संततीनें ह्या गोष्टी जाणाव्या;
त्यांनीं त्या आपल्या मुलांस कथन करण्यास
उद्युक्त व्हावें.
७ त्यांनीं देवावर भाव ठेवावा,

देवाचीं कृत्यें विसरूं नयेत,
तर त्याच्या आज्ञा पाळाव्या;
८ आणि त्यांनीं आपल्या पूर्वजांसारखे हट्टी,
बंडखोर स्वभावाचे,
आपलें अंतःकरण नीट न राखणारे व देवाशीं
एकनिष्ठपणें न वागणारे असे होऊं नये.
९ एफ्राइमाच्या वंशजांनीं सशस्त्र व धनुर्धारी असूनहि
लढाईच्या वेळीं पाठ फिरविली.
१० त्यांनीं देवाचा करार पाळिला नाहीं;
त्याच्या नियमशास्त्राप्रमाणें चालावयास
ते कबूल नव्हते;
११ आणि त्यानें केलेल्या गोष्टी व त्यानें त्यांस दाखविलेलीं अद्भुत कृत्यें ते विसरले.
१२ मिसर देशांत सोअनाच्या पटांगणावर
त्यांच्या वडिलांसमक्ष त्यानें अद्भुत कृत्यें केलीं.
१३ त्यानें समुद्र दुभागून त्यांतून त्यांस पार नेलें;
त्यानें पाणी राशीसारखें उभें केलें.
१४ दिवसा मेघ व रात्रभर अग्निप्रकाश
यांच्या योगें तो त्यांस नेत असे.
१५ त्यानें रानांत खडक फोडून
खोल जलाशयांप्रमाणें भरपूर पाणी त्यांस
प्यावयास दिलें.
१६ त्यानें खडकांतून पाण्याचे प्रवाहहि काढिले,
नद्यांप्रमाणें पाणी वाहविलें.
१७ तथापि ते त्याच्याविरुद्ध अधिकाधिक पातक
करूं लागले,
परात्पराविरुद्ध रुक्ष अरण्यांत त्यांनीं बंड केलें.
१८ त्यांनीं आपली वासना तृप्त करण्यासाठीं
अन्न मागून
आपल्या मनांत देवाची परीक्षा पाहिली.
१९ ते देवाविरुद्ध बोलले;
ते म्हणाले, रानांत भोजनाची सिद्धता करण्यास
ईश्वर समर्थ आहे काय ?
२० पाहा, त्यानें खडकावर टोला मारिला तों पाणी
भळभळां वाहूं लागलें,
व त्याचे लोट चालले;
तो भाकरीहि देण्यास समर्थ आहे काय ?
तो आपल्या लोकांस मांस पुरवील काय ?
२१ हें ऐकून परमेश्वर कोपला
आणि याकोबवंशावर त्याचा अग्नि पेटला;
इस्राएलवंशावर त्याचा क्रोध भडकला;
२२ कारण त्यांनीं देवावर विश्वास ठेविला नाहीं;
आणि त्यानें सिद्ध केलेल्या तारणावर भरंवसा ठेविला
नाहीं.
२३ तरी त्यानें वरतीं आभाळास आज्ञा केली,
व आकाशद्वारें उघडलीं.
२४ खाण्याकरितां त्यानें त्यांजवर मान्न्याचा वर्षाव केला;
आणि त्यांस स्वर्गीचें धान्य दिलें.
२५ दिव्यदूतांची भाकर मानवांनीं खाल्ली;
पुरून उरे इतकें अन्न त्यानें त्यांस दिलें.
२६ त्यानें पूर्वेचा वारा आकाशांत वाहविला;
आणि आपल्या सामर्थ्यानें दक्षिणेचा वारा
त्यानें आणिला.
२७ त्यानें त्यांजवर धुळीसारखा मांसाचा वर्षाव केला,
समुद्रांच्या वाळूसारखी पक्ष्यांची वृष्टि केली;
२८ त्यानें त्यांच्या छावणीमध्यें,
त्यांच्या वस्तीच्या ठिकाणाभोवतीं तें पाडिलें.
२९ तें खाऊन ते अतितृप्त झाले;
अशा रीतीनें त्यांची वासना त्यानें पुरविली.
३० त्यांची वासना सुटली नव्हती,
त्यांच्या तोंडीं अन्नाचा घास होता,
३१ इतक्यांत त्यांजवर देवाचा कोप भडकला,
आणि त्यानें त्यांच्यांतल्या धष्टपुष्टांस
मारून टाकिलें,
इस्राएलांच्या तरुणांस ठोकून खालीं पाडिलें.
३२ हें सर्व झालें तरी ते पाप करीतच राहिले,
व त्याच्या अद्भुत कृत्यांवर त्यांनीं विश्वास
ठेविला नाहीं.
३३ यामुळें त्यानें त्यांचे दिवस
व त्यांचीं वर्षे एकाएकीं संपविलीं.

३४ तो त्यांचा वध करूं लागला
तेव्हां ते त्याचा शोध करूं लागले;
ते परमेश्वराकडे वळून अनन्यभावें
त्याला शरण गेले.
३५ देव आमचा दुर्ग आहे,
परात्पर परमेश्वर आम्हांस मुक्त करणारा आहे,
ही आठवण त्यांस झाली.
३६ त्यांनीं आपल्या मुखानें त्याजशीं कपट केलें,
आपल्या जिव्हेनें त्याजशीं लबाडी केली.
३७ कारण त्यांचें मन त्याच्या ठायीं स्थिर नव्हतें,
शिवाय त्याचा करार त्यांनीं इमानानें
पाळिला नाहीं;
३८ पण तो कनवाळू असल्यामुळें त्यांच्या अपराधाची
क्षमा करीत असतो,
तो नाश करीत नाहीं;
तो आपला कोप वारंवार आवरितो,
आपला सगळा संताप भडकूं देत नाहीं.
३९ ते केवळ देहमय आहेत, वाऱ्याची झुळुक निघून
जाते आणि परत येत नाहीं तसे ते आहेत,
याची त्यानें आठवण केली.
४० कितीदा त्यांनीं रानांत त्याजविरुद्ध बंडाळी केली;
कितीदा त्यांनीं अरण्यांत त्याला दुःख दिलें.
४१ पुनः पुनः त्यांनीं ईश्वराची परीक्षा पाहिली,
व इस्राएलाच्या पवित्र प्रभूस दुखविलें.
४२ त्याच्या प्रतापी हस्ताचें त्यांस स्मरण झालें नाहीं;
त्यानें त्यांस शत्रूंपासून सोडविलें;
४३ त्यानें मिसर देशांत आपलीं चिन्हें,
सोअनाच्या पटांगणावर आपलीं अद्भुत कृत्यें दाखविलीं, तो दिवस त्यांनीं आठविला नाहीं.
४४ त्यानें त्यांच्या नील नदींतील पाण्याचें रक्त केलें,
म्हणून त्यांच्यानें तिचें वाहतें पाणी पिववेना.
४५ त्यानें त्यांच्यामध्यें माशा पाठविल्या
त्या त्यांस डसल्या;
आणि बेडूक पाठविले त्यांनीं त्यांचें सर्व कांहीं
नासून टाकिलें.
४६ त्यानें त्यांच्या शेतांतल्या उत्पन्नावर सुरवंट
व त्यांच्या श्रमफलावर टोळ पडूं दिले.
४७ त्यानें गारांनीं त्यांच्या द्राक्षवेलांचा
व बर्फानें त्यांच्या उंबराच्या झाडांचा नाश केला.
४८ त्यानें त्यांचीं गुरेंढोरें गारांच्या,
व जनावरें विजांच्या हवालीं केलीं.
४९ त्यानें त्यांजवर आपला कोपाग्नि, क्रोध,
रोष व संकट
ह्या अनिष्टकारक दूतांची स्वारी सोडिली.
५० त्यानें आपल्या कोपासाठीं मार्ग सिद्ध केला;
त्यानें त्यांचा जीव मृत्यूपासून रक्षिला नाहीं,
तर त्यांचा प्राण मरीच्या हवालीं केला.
५१ त्यानें मिसर देशांतले सर्व प्रथम जन्मलेले,
हामाच्या डेऱ्यांतले त्यांच्या पौरुषाचें प्रथमफल
त्यांस मारिलें;
५२ पण त्यानें आपल्या लोकांस मेंढरांसारखे बाहेर
आणून
त्यांस कळपाप्रमाणें रानांतून नेलें.
५३ त्यानें त्यांस सुखरूप नेलें, ते भ्याले नाहींत;
त्यांच्या शत्रूंला तर समुद्रानें बुडवून टाकिलें.
५४ त्यानें त्यांस आपल्या पवित्र प्रदेशाकडे
आपल्या उजव्या हातानें मिळविलेल्या
डोंगराकडे आणिलें.
५५ त्यानें त्यांजकडून राष्ट्रें हाकून लाविलीं,
त्यांच्या राहण्याच्या जागा सूत्रानें मापून
त्यांस वतन म्हणून वांटून दिल्या,
आणि त्यांच्या तंबूंत इस्राएलाचे वंश वसविले.
५६ तरी त्यांनीं परात्पर देवाची परीक्षा पाहिली व
त्याजविरुद्ध बंड केलें,
व त्याचे निर्बंध पाळिले नाहींत,
५७ तर आपल्या पूर्वजांप्रमाणें त्याजकडे पाठ करून
ते फितूर झाले;
वक्र धनुष्यासारखे ते वळले.
५८ त्यांनीं आपल्या उच्चस्थानांमुळें त्याला राग आणिला;

१ अथवा : आळा घातला

आपल्या कोरींव मूर्तीमुळें त्याला ईर्ष्या आणिली.
५९ हें ऐकून देव कोपला
आणि इस्राएलास अगदीं कंटाळला;
६० त्यानें शिलो येथील निवासमंडप
म्हणजे मानवांमध्यें उभारिलेला डेरा सोडून दिला;
६१ त्यानें आपल्या बलाचा पाडाव होऊं दिला,
व आपलें वैभव शत्रूच्या हातीं पडूं दिलें.
६२ त्यानें आपले लोक तरवारीच्या हवालीं केले;
आपल्या वतनावर तो रुष्ट झाला.
६३ अग्नीनें त्यांचे कुमार खाऊन टाकिले;
त्यांच्या कुमारींस लग्नगीतें लाभलीं नाहींत.
६४ त्यांचे याजक तरवारीनें पडले;
व त्यांच्या विधवा रडल्या नाहींत.
६५ तेव्हां प्रभु झोपेंतून जागा झालेल्या मनुष्या-
सारखा उठला.
द्राक्षारस पिऊन आरोळी मारणाऱ्या वीरा-
सारखा उठला.
६६ त्यानें आपल्या शत्रूंस मारून मागें हटविलें;
त्यांची कायमची अप्रतिष्ठा केली.
६७ त्यानें योसेफाचा डेरा वर्जिला,
एफ्राइमाचा वंश पसंत केला नाहीं;
६८ तर यहूदाचा वंश त्यानें पसंत केला;
आपणाला प्रिय जो सीयोन डोंगर तो त्यानें
पसंत केला.
६९ आकाशासारखें उंच व आपण चिरकाल
स्थापिलेल्या पृथ्वीसारखें
त्यानें आपलें पवित्रस्थान बांधिलें.
७० त्यानें आपला सेवक दावीद यास निवडिलें;
त्यास त्यानें मेंढरांच्या कोंडवाड्यांतून घेतलें;
७१ आपली प्रजा म्हणजे याकोबाची संतति, आपलें
वतन इस्राएल लोक, यांचें पालन करण्यास,
दुभत्या मेंढ्यांमागें तो होता तेथून त्यानें
त्यास आणिलें.
७२ आणि त्यानें आपल्या मनाच्या सरळतेनें
त्यांचें पालन केलें,
आपल्या हातांच्या चातुर्यानें त्यांस मार्ग दाखविला.

## ७९

[ आसाफाचें स्तोत्र ]

१ हे देवा, तुझ्या वतनांत परराष्ट्रें शिरलीं आहेत;
त्यांनीं तुझें पवित्र मंदिर भ्रष्ट केलें आहे;
त्यांनीं यरुशलेमाचे ढिगारे केले आहेत.
२ त्यांनीं आकाशांतल्या पांखरांस
तुझ्या सेवकांचीं प्रेतें,
व पृथ्वीवरील पशूंस तुझ्या भक्तांचें मांस खाव-
यास दिलें आहे.
३ त्यांनीं यरुशलेमाभोवतीं त्यांचें रक्त पाण्या-
सारखें वाहविलें;
त्यांस पुरावयास कोणी राहिलें नाहीं.
४ आम्ही आमच्या शेजाऱ्यांस निंदास्पद
आणि आमच्या सभोवतालच्या लोकांस तुच्छ
व हास्यास्पद झालों आहों.
५ हे परमेश्वरा, हें कोठवर चालणार ?
तूं सर्वकाळ कोपायमान राहणार काय ?
तुझा रोष अग्नीसारखा भडकत राहणार काय ?
६ जीं राष्ट्रें तुला जाणत नाहींत,
जीं राज्यें तुझें नाम घेऊन धांवा करीत नाहींत,
त्यांवर तूं आपला क्रोधाचा मारा कर.
७ कारण त्यांनीं याकोबाला गिळून टाकिलें आहे,
व त्यांची वस्ती ओसाड केली आहे.
८ आमच्या पूर्वजांचीं दुष्कर्में आठवून आमची हानि
करूं नको;
तुझी करुणा आम्हांवर सत्वर होवो;
कारण आम्ही फार दुर्दशेंत पडलों आहों.
९ हे आमच्या उद्धारक देवा,
तूं आपल्या नामाच्या महिम्याकरितां आमचें
साहाय्य कर;
आपल्या नामाकरितां आम्हांस सोडीव व आमचीं
पातकें पुसून टाक.
१० यांचा देव कोठें आहे असें राष्ट्रांनीं कां म्हणावें ?
तुझ्या सेवकांचा रक्तपात झाला त्याबद्दलचा सूड

उगविण्यांत आला आहे
हें आमच्यादेखत राष्ट्रांस कळूं दे.
११ बंदिवानाचें कण्हणें तुझ्या कानीं येवो;
ज्यांचा वध करण्याचें ठरलें आहे त्यांस तूं
आपल्या बाहुबलानें वांचीव.
१२ हे प्रभू, आमच्या शेजारच्या राष्ट्रांनीं केलेली
तुझी निंदा
त्यांच्या पदरीं उलट सातपट घाल.
१३ मग जे आम्ही तुझी प्रजा व तुझ्या कुरणांतलीं
मेंढरें
ते सर्वकाळ तुझें उपकारस्मरण करीत राहूं;
तुझी कीर्ति पिढ्यानपिढ्या वर्णीत जाऊं.

८० [ मुख्य गवयासाठीं; शोशन्नीम एदूथ (बिषिमूकमलें) या चालीवर गावयाचें आसाफाचें स्तोत्र ]

१ हे इस्राएलाच्या मेंढपाळा,
जो तूं योसेफाला कळपाप्रमाणें चालवितोस
तो तूं कान दे;
जो तूं करूबारूढ आहेस तो तूं आपलें तेज
प्रगट कर.
२ एफ्राईम, बन्यामीन व मनश्शे यांसमक्ष तूं आपला
पराक्रम दाखीव,
आणि आम्हांस तारावयास ये.
३ हे देवा, तूं आम्हांस परत आण;
आपला मुखप्रकाश आम्हांवर पाड
म्हणजे आम्ही तरूं.
४ हे परमेश्वरा, सेनाधीश देवा,
तुझे लोक प्रार्थना करीत असतां तूं कोठवर
कोपायमान राहणार ?
५ तूं त्यांस अश्रुरूप अन्न खावयास दिलें आहे,
आणि त्यांस मापें भरून आसवें प्यावयास
दिलीं आहेत.
६ तूं आम्हांस आमच्या शेजाऱ्यांच्या कलहास
कारण करितोस;
आणि आमचे वैरी आमचा यथेच्छ उपहास करितात.
७ हे सेनाधीश देवा, तूं आम्हांस परत आण;
तूं आपला मुखप्रकाश आम्हांवर पाड
म्हणजे आम्ही तरूं.
८ मिसर देशांतून तूं द्राक्षवेल काढून आणिला;
आणि राष्ट्रांस घालवून देऊन तो तेथें लाविला.
९ तूं त्याकरितां जागा तयार केली
आणि त्यानें मूळ धरून देश व्यापिला.
१० त्याच्या छायेनें पर्वत,
आणि त्याच्या फांद्यांनीं परमेश्वराचे गंधसरू
आच्छादित झाले.
११ त्यानें आपल्या फांद्या समुद्रापर्यंत
आणि आपले फाटे फरात नदीपर्यंत लांबविले.
१२ त्याचीं कुंपणें तूं कां मोडिलीं ?
ह्यामुळें वाटेनें येणारेजाणारे सगळे
त्याचीं द्राक्षें तोडितात.
१३ रानडुकर त्याची नासधूस करितात,
वनपशु त्याच्यावर आपला निर्वाह करितात.
१४ हे सेनाधीश देवा, तूं माघारा फीर अशी आम्ही
विनंति करितों;
स्वर्गांतून दृष्टि लावून पाहा व ह्या द्राक्षवेलाचें
संगोपन कर;
१५ जो रोपा तूं आपल्या
उजव्या हातानें लाविला,
जी शाखा तूं स्वतांसाठीं मजबूत केली तिचें
संगोपन कर.
१६ ती अग्नीनें जाळिली आहे, ती तोडून टाकिली आहे;
तुझ्या मुखाच्या धमकीनें तुझे लोक नष्ट होतात.
१७ तुझ्या उजव्या हाताकडे असलेल्या पुरुषावर,
तूं आपल्यासाठीं बलवान् केलेल्या मानवपुत्रावर
तुझा हात राहो;
१८ म्हणजे आम्ही तुजपासून वळणार नाहीं;
आमच्या जिवांत जीव आण म्हणजे आम्ही तुझ्या
नामाचा धावा करूं.
१९ हे परमेश्वरा, सेनाधीश देवा, तूं आम्हांस परत आण;
तूं आपला मुखप्रकाश आम्हांवर पाड
म्हणजे आम्ही तरूं.

# ८१

[ मुख्य गवयासाठीं; गित्ती चालीवर गावयाचें आसाफाचें स्तोत्र ]

१ देव जो आमचें सामर्थ्य, त्याचें मोठ्यानें गुणगान
करा; याकोबाच्या देवाचा जयजयकार करा.
२ सुरावर गीत म्हणा, आणि डफ इकडे घेऊन या;
मंजुळ वीणा व सतार वाजवा.
३ शुक्ल प्रतिपदेस, पौर्णिमेस,
आमच्या सणाच्या दिवशीं करणा वाजवा.
४ कारण हा इस्राएलासाठीं नियम आहे, हा
याकोबाच्या देवाचा निर्बंध आहे.
५ तो मिसर देशावरून गेला,
तेव्हां त्यानें योसेफांत हाच निर्बंध
साक्षीसाठीं नेमिला;
ज्याला मीं ओळखलें नव्हतें त्याचें भाषण मीं
ऐकलें; तें असें कीं
६ मीं त्याच्या खांद्यावरला भार काढिला आहे;
त्याच्या हातांतली पाटी काढून घेतली आहे.
७ तूं संकटांत असतां आरोळी केली
तेव्हां मीं तुला सोडविलें;
मीं तुला मेघगर्जनेच्या गुप्त स्थलांतून उत्तर दिलें;
मरीबाच्या जलांजवळ मीं तुला पारखिलें. [ सेला ]
८ अहो माझ्या लोकांनो, ऐका, मी तुम्हांस
बोध करितों;
हे इस्राएला, तूं माझें ऐकशील तर बरें होईल !
९ तुला अन्य देव नसावा,
तूं परक्या देवाच्या पायां पडूं नये.
१० मीच तुझा देव परमेश्वर आहें,
मींच तुला मिसर देशांतून बाहेर काढिलें,
तूं आपलें तोंड चांगलें उघड म्हणजे मी तें भरीन;
११ परंतु माझ्या लोकांनीं माझी वाणी ऐकली नाहीं;
इस्राएलानें माझें ऐकलें नाहीं.
१२ ह्यामुळें मी त्यांस त्यांच्या हृदयाच्या निष्ठुरतेप्रमाणें
वागूं दिलें,
ते आपल्याच संकल्पांप्रमाणें चालले.
१३ माझे लोक माझें ऐकतील,
इस्राएल माझ्या मार्गांनीं चालेल,
तर बरें होईल !
१४ मी तेव्हांच त्यांच्या वैऱ्यांचा मोड करीन,
त्यांच्या शत्रूंवर मी आपला हात चालवीन;
१५ परमेश्वराचे द्वेष्टे त्याला वश होतील,
पण इस्राएलाचा काल अखंड राहील.
१६ मी त्याला गव्हाचें सत्व खाऊं घालीन
आणि पहाडांतल्या मधानें मी तुला तृप्त करीन.

# ८२

[ आसाफाचें स्तोत्र ]

१ देव आपल्या मंडळींत उभा आहे;
तो सत्ताधीशांमध्यें न्याय करून म्हणतो;
२ तुम्ही कोठवर विपरीत न्याय कराल,
कोठवर दुर्जनांची तरफदारी कराल ? [ सेला ]
३ गरीब व अनाथ यांचा न्याय करा;
दीन व कंगाल यांची दाद घ्या.
४ दुबळे व गरजवंत यांस मुक्त करा;
दुर्जनांच्या हातांतून त्यांस सोडवा.
५ त्यांना माहिती नाहीं व कळतहि नाहीं;
ते अंधारांत इकडेतिकडे फिरतात;
पृथ्वीचे सर्व आधारस्तंभ ढळले आहेत.
६ मी म्हणालों, तुम्ही देव आहां,
तुम्ही सर्व परात्पराचे पुत्र आहां.
७ तरी मर्त्य मानवांप्रमाणें तुम्ही मराल,
एकाद्या सरदाराप्रमाणें तुम्ही पडाल.
८ हे देवा, ऊठ, पृथ्वीचा न्याय कर;
कारण तूं सर्व राष्ट्रांचा मालक आहेस

# ८३

[ आसाफाचें गीत; संगीत स्तोत्र ]

१ हे देवा, तूं स्तब्ध राहूं नको.
हे देवा, मौन धरूं नको, स्वस्थ राहूं नको.

मुळांत : देवांमध्यें

२ कारण पाहा, तुझे शत्रु दंगल करीत आहेत;
तुझ्या द्वेष्ट्यांनीं डोकें वर काढिलें आहे.
३ ते तुझ्या लोकांविरुद्ध कपटाची योजना करितात;
तुझ्या आश्रितांविरुद्ध ते मसलत करितात.
४ ते म्हणतात, चला, आपण राष्ट्रांतून त्यांचा
विध्वंस करूं,
म्हणजे इस्राएलाच्या नांवाची आठवण पुढें
राहणार नाहीं.
५ कारण त्यांनीं एकचित्तानें मसलत केली आहे;
ते तुझ्याविरुद्ध कट करितात;
६ तंबूंत राहणारे अदोमी व इश्माएली,
मवाब व हगारी,
७ गबाल, अम्मोन व अमालेक,
पलेशेथ व सोरकर हे ते आहेत;
८ अश्शूरहि त्यांस सामील झाला आहे;
त्यांनीं लोटाच्या वंशजांस हात दिला आहे. [ सेला ]
९ मिद्यानाला, आणि सीसरा व याबीन यांला,
कीशोन नदीजवळ
तूं जसें केलें, तसें त्यांना कर;
१० ते एन-दोर येथें नाश पावले;
ते शेताला खत झाले.
११ ओरेब व जेब यांच्यासारखे त्यांच्या
अमिरांला कर;
जेबह व सल्मुन्ना यांसारखे त्यांच्या सर्व
सरदारांस कर.
१२ ते म्हणतात, देवाचीं निवासस्थानें
आपल्या ताब्यांत घेऊं या.
१३ हे माझ्या देवा, वावटळीच्या धुरळ्यासारखें,
वाऱ्यानें उडविलेल्या भुसासारखें त्यांस कर.
१४ अग्नि वनाला भस्म करितो,
ज्वाला डोंगराला आग लावते,
१५ त्याप्रमाणें तूं आपल्या वादळानें त्यांचा
पाठलाग कर
व आपल्या तुफानानें त्यांस घाबरवून सोड.
१६ हे परमेश्वरा, त्यांनीं तुझ्या नामाचा शोध करावा
म्हणून त्यांचीं मुखें अगदीं लज्जित कर.
१७ ते सदासर्वकाळ फजीत व भयभीत होवोत;
ते लज्जित होवोत, ते नष्ट होवोत;
१८ म्हणजे तूं, केवळ तूंच, परमेश्वर या नामानें
सर्व पृथ्वीवर परात्पर आहेस
असें त्यांना कळून येईल.

## ८४

[ मुख्य गवयासाठीं; गित्ती चालीवर गावयाचें कोरहपुत्रांचें स्तोत्र ]

१ हे सेनाधीश परमेश्वरा,
तुझीं निवासस्थानें किती रम्य आहेत !
२ माझ्या जिवाला परमेश्वराच्या अंगणांची उत्कंठा
लागली असून तो झुरत आहे;
माझा जीव व देह अमर देवाला हर्षानें आरोळी
मारीत आहेत.
३ हे सेनाधीश परमेश्वरा, माझ्या राजा,
माझ्या देवा,
तुझ्या वेद्यांजवळ आपल्या पिलांसाठीं घरटें
करावयास चिमणीस,
आणि कोटें बांधावयास निळवीस स्थळ
मिळालें आहे.
४ तुझ्या मंदिरांत राहणाऱ्यांची केवढी धन्यता !
ते निरंतर तुझी स्तुति करीत राहतील. [ सेला ]
५ ज्या मनुष्याला तुजपासून सामर्थ्य प्राप्त होतें,
ज्याच्या मनाला सीयोनाच्या मार्गांचा ध्यास
लागला आहे तो केवढा धन्य !
६ शोकजनक खोऱ्यांतून जातांना तें त्यांस झऱ्यांचें
स्थानच वाटतें;
आगोटीचा पाऊसहि त्याची आबादानी करितो.
७ ते अधिकाधिक शक्ति पावत जातात,
सीयोनांत प्रत्येकाला देवाचें दर्शन लाभतें.
८ हे परमेश्वरा, सेनाधीश देवा,
माझी प्रार्थना ऐक;

---

१ मुळांत: याव्हे ( निर्गम ६:३ )
२ मुळांत: बाका

हे याकोबाच्या देवा, कान दे. [ सेला ]
९ देवा, तूं आमची ढाल आहेस, अवलोकन कर,
तूं आपल्या अभिषिक्ताच्या मुखाकडे दृष्टि लाव.
१० खरोखर तुझ्या अंगणांतील एक दिवस
हा सहस्र दिवसांपेक्षां उत्तम आहे;
दुष्टाईच्या तंबूंत राहण्यापेक्षां
माझ्या देवाच्या मंदिराचा द्वारपाळ होणें मला
इष्ट वाटतें.
११ कारण परमेश्वर देव सूर्य व ढाल आहे,
परमेश्वर अनुग्रह व गौरव देतो;
जे सात्विकपणें चालतात त्यांस
उत्तम तें दिल्यावांचून तो राहणार नाहीं.
१२ हे सेनाधीश परमेश्वरा,
जो मनुष्य तुजवर भाव ठेवितो
तो किती तरी धन्य !

## ८५ [ मुख्य गवयासाठीं; कोरहपुत्रांचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, तूं आपल्या देशावर प्रसन्न
झाला आहेस;
तूं याकोबाला बंदिवासांतून परत आणिलें आहे.
२ तूं आपल्या लोकांच्या अधर्माची क्षमा केली आहे,
त्यांच्या सर्व पापांवर
पांघरूण घातलें आहे. [ सेला ]
३ तूं आपला सर्व क्रोध आवरिला आहे;
तूं आपल्या कोपाची तीव्रता सोडून दिली आहे.
४ हे आमच्या उद्धारक देवा, आम्हांस परत आण;
आणि आम्हांवरील आपला रोष नाहींसा कर.
५ तूं आम्हांवर सर्वकाळ कोपलेला राहणार काय ?
पिढ्यानपिढ्या तूं आपला क्रोध चालू
ठेवणार काय ?
६ तुझ्या लोकांनीं तुझ्या ठायीं हर्ष पावावा
म्हणून तूं आमचें पुनरुज्जीवन करणार
नाहींस काय ?
७ हे परमेश्वरा, तुझ्या दयेचा आम्हांस अनुभव येऊं दे,
व तूं सिद्ध केलेलें तारण आम्हांस दे.
८ परमेश्वर देव काय बोलेल तें मी ऐकून घेईन;
कारण तो आपल्या लोकांशीं व आपल्या भक्तांशीं
क्षेमकुशलाचें भाषण करील;
मात्र त्यांनीं मूर्खपणाकडे पुनः वळूं नये.
९ त्याचें भय धरणाऱ्यांना त्यानें सिद्ध केलेलें तारण
खरोखर समीप असतें;
यासाठीं कीं आमच्या देशांत वैभव नांदावें.
१० दया व सत्य हीं एकत्र झालीं आहेत;
न्याय्यत्व व शांति यांनीं एकमेकांचें
चुंबन घेतलें आहे;
११ पृथ्वींतून सत्य बाहेर पडत आहे;
स्वर्गांतून न्याय्यत्व अवलोकन करीत आहे.
१२ जें उत्तम तें परमेश्वर देईल;
आणि आमची भूमि आपलें फळ देईल .
१३ त्याच्यापुढें नीतिमत्ता चालेल,
व त्याचीं पावलें इतरांना मार्गदर्शक होतील.

## ८६ [ दाविदाची प्रार्थना ]

१ हे परमेश्वरा, कान लाव, मला उत्तर दे;
मी दीन व दरिद्री आहें.
२ माझ्या जिवाचें रक्षण कर, कारण मी तुझा भक्त
आहें;
हे माझ्या देवा, तुजवर भाव ठेवणाऱ्या सेवकाचें
तारण कर.
३ हे प्रभू, मजवर कृपा कर;
कारण मी दिवसभर तुझा धावा करितों.
४ हे प्रभू, आपल्या सेवकाचा जीव हर्षित कर;
मी आपलें चित्त तुजकडे लावितों.
५ हे प्रभू, तूं उत्तम व क्षमाशील आहेस
आणि तुझा धावा करणाऱ्या सर्वांवर विपुल दया
करणारा आहेस.
६ हे परमेश्वरा, माझ्या प्रार्थनेकडे कान दे;
माझ्या काकळुतीच्या वाणीकडे लक्ष दे.

७ मी आपल्या संकटसमयीं तुझा धावा करीन;
कारण तूं मला उत्तर देशील.
८ हे प्रभू, देवांमध्यें तुजसमान कोणी नाहीं,
आणि तुझ्या कृत्यांसारखीं कोणतींहि कृत्यें नाहींत.
९ हे प्रभू, तूं उत्पन्न केलेलीं सर्व राष्ट्रें येऊन तुझ्या
पायां पडतील,
तुझ्या नामाचा महिमा गातील.
१० कारण तूं थोर व अद्भुत कृत्यें करणारा आहेस;
तूंच केवळ देव आहेस.
११ हे परमेश्वरा, तुझा मार्ग मला दाखीव;
मी तुझ्या सत्यमार्गानें चालेन;
तुझ्या नामाचें भय धरण्यास माझें चित्त एकाग्र कर.
१२ हे प्रभू, माझ्या देवा, मी आपल्या जिवेंभावें
तुझें गुणगान गाईन,
तुझ्या नामाचा महिमा सदोदित वर्णीन.
१३ कारण मजवर तुझी दया फार आहे;
अधोलोकाच्या तळापासून तूं माझा जीव
उद्धरिला आहे.
१४ हे देवा, उन्मत्त लोक मजवर उठले आहेत,
बलात्कारी लोकांचा समुदाय माझा जीव घ्याव-
यास पाहत आहे;
ते तुला जुमानीत नाहींत.
१५ तरी हे प्रभू, तूं सदय व कृपाळू देव आहेस.
मंदक्रोध, दयामय व सत्यसंपन्न आहेस.
१६ तूं मजकडे वळून मजवर कृपा कर.
आपल्या दासाला आपलें सामर्थ्य दे,
आपल्या दासीच्या पुत्राचें तारण कर.
१७ हे परमेश्वरा, तूं मजवर प्रसन्न झाल्याचें कांहीं
चिन्ह दाखीव, यासाठीं कीं तूं माझें साहाय्य व
समाधान केलें आहे,
हें पाहून माझ्या द्वेष्ट्यांनीं लज्जित व्हावें.

## ८७ [ कोरहपुत्रांचें संगीत स्तोत्र ]

१ परमेश्वराचें अधिष्ठान पवित्र पर्वतांवर आहे.
२ याकोबाच्या सर्व वसतिस्थानांहून,
सीयोनाचीं द्वारें त्याला अधिक प्रिय आहेत.
३ हे देवाच्या नगरा,
तुझ्या वैभवाच्या कथा सांगतात; [ सेला ]
४ राहाब व बाबेल मला ओळखितात असें मी
विदित करीन;
पाहा, पलेशेथ, सोर व कूश,
यांचाहि जन्म तेथलाच असें म्हणतील.
५ सीयोनाविषयीं म्हणतील कीं प्रत्येक मनुष्य त्यांतच
जन्मला होता,
आणि परात्पर त्याला दृढ करील.
६ लोकांची नांवनिशी करितांना
अमुक तेथें जन्मला, असें परमेश्वर लिहील. [ सेला ]
७ गायन व नृत्य करणारे म्हणतील :
माझे सर्व उगम तुझ्याच ठायीं आहेत.

## ८८ [ कोरहपुत्रांचें संगीत स्तोत्र, मुख्य गवयासाठीं; महलथ या चालीवर गायचें, एज्राहीय हेमान याचें मास्कील (ध्यानपर स्तोत्र) ]

१ हे परमेश्वरा, माझ्या उद्धारक देवा,
मी रात्रंदिवस तुजपुढें आरोळी करितों;
२ माझी प्रार्थना तुजपुढें सादर होवो;
माझ्या विनवणीकडे तुझा कान असूं दे;
३ कारण माझा जीव क्लेशांनीं व्यापिला आहे;
माझा प्राण अधोलोकाजवळ जाऊन
पोहंचला आहे.
४ गर्तेंत पडणाऱ्यांत माझी गणना झाली आहे;
मी निराधार पुरुषासारखा झालों आहें;
५ मला प्रेतांमध्यें टाकिलें आहे;
वध होऊन जे कबरेंत पडले आहेत,
ज्यांची आठवण तूं कधीं करीत नाहींस,
ज्यांना तुझ्या हाताचा आधार तुटला आहे,
त्यांसारखा मी झालों आहें.
६ गर्तेच्या अगदीं तळाशीं, अंधकारमय स्थळीं,
खोल डोहांत तूं मला टाकिलें आहे.

७ तुझ्या संतापाचा भार मजवर पडला आहे,
तूं आपल्या सर्व लाटांनीं
मला पीडिलें आहे. [ सेला ]
८ तूं माझ्या परिचितांना मजपासून दूर केलें आहे;
त्यांना माझा वीट येईल असें तूं मला केलें आहे;
मी कोंडलेला आहें, माझ्यानें बाहेर निघवत नाहीं.
९ कष्टामुळें माझे डोळे क्षीण झाले आहेत;
हे परमेश्वरा, मी दररोज तुझा धावा करितों;
तुजपुढें मी आपले हात पसरितों.
१० मृतांकरितां तूं अद्भुत कृत्यें करशील काय ?
प्रेतें उठून तुझी स्तुति करितील काय ? [ सेला ]
११ तुझ्या कृपेचें वर्णन शवगर्तेत होईल काय ?
विनाशस्थानीं तुझ्या सत्यतेचें वर्णन होईल काय ?
१२ अंधकारांत तुझीं अद्भुत कृत्यें प्रकट होतील काय ?
विस्मरणलोकीं तुझें न्याय्यत्व प्रकट होईल काय ?
१३ मी तर, हे परमेश्वरा, तुझा धावा करितों;
प्रातःकाळीं माझी प्रार्थना तुजपुढें सादर होते.
१४ हे परमेश्वरा, तूं माझ्या जिवाचा त्याग
कां करितोस ?
तूं आपलें मुख मजपासून कां लपवितोस ?
१५ मी तारुण्यापासून पीडा पावून मरणोन्मुख
झालों आहें;
तुझ्या भीतीनें मी व्याकुळ झालों आहें.
१६ तुझा क्रोध मजवर ओढवला आहे;
तुझ्या धाकानें मी केवळ नष्टप्राय झालों आहें.
१७ त्यांनीं जलाप्रमाणें मला दिवसभर घेरिलें आहे;
त्यांनीं मला सर्वस्वीं वेढून टाकिलें आहे.
१८ तूं मजपासून प्रियजन व मित्र दूर केले आहेत,
माझ्या परिचयाचा कायतो अंधकारच आहे.

# ८९ [ एज्राहीय एथान याचें मास्कील (ध्यानपर स्तोत्र) ]

१ परमेश्वराच्या दयेविषयीं मी नित्य गीत गाईन;
मी आपल्या मुखानें पिढ्यानपिढ्यांना
तुझी सत्यता कळवीन.
२ कारण मी म्हणालों, तुझ्या दयेची उभारणी सदो-
दित होत राहील;
स्वर्गांत तुझी सत्यता तूंच स्थापिली आहे.
३ मीं आपल्या निवडलेल्या पुरुषाशीं करार केला आहे;
मीं आपला सेवक दावीद याजशीं शपथ केली आहे :
४ मी तुझ्या संततीची परंपरा सर्वकाळ चालवीन,
तुझें सिंहासन पिढ्यानपिढ्या स्थिर स्थापीन. [ सेला ]
५ हे परमेश्वरा, तुझ्या अद्भुत कृतींची स्तुति
आकाश करील;
तुझ्या सत्यतेची स्तुति पवित्रजनांच्या
मंडळींत होईल.
६ कारण परमेश्वराशीं तुलना करितां येईल असा
आकाशांत कोण आहे ?
दिव्यदूतांच्या मंडळांत परमेश्वरासमान कोण आहे ?
७ पवित्रजनांच्या सभेंत भीति बाळगण्यास योग्य
असा एक देव आहे,
त्याच्या सभोवतालच्या सर्वांपेक्षां तो भीतिप्रद आहे.
८ हे सेनाधीश देवा, परमेश्वरा,
तुझ्यासारखा समर्थ कोण आहे ?
हे परमेश्वरा, तुझी सत्यता तुजभोंवतीं आहे.
९ समुद्राचा खळबळाट तूं निवांत करितोस;
तो उचंबळतो तेव्हां त्याच्या लाटा तूं शांत करितोस.
१० तूं राहाबाला ठेचून ठार केलें आहे;
तूं आपल्या बाहुबलानें आपल्या शत्रूंची दाणादाण
केली आहे.
११ आकाश तुझें आहे, पृथ्वीहि तुझी आहे;
जग व जगांतलें सर्व कांहीं तूंच स्थापिलें आहे.
१२ उत्तर व दक्षिण ह्या तूं उत्पन्न केल्या;
ताबोर व हर्मोन तुझ्या नामाचा
जयजयकार करितात.
१३ तुझा भुज पराक्रमी आहे;
तुझा हात बळकट आहे,
तुझा उजवा हात उभारलेला आहे.
१४ नीति व न्याय हीं तुझ्या सिंहासनाचा
पाया आहेत;

दया व सत्य तुझे सेवक आहेत.
१५ ज्या लोकांस उत्साहशब्दाचा परिचय आहे ते धन्य!
हे परमेश्वरा, ते तुझ्या मुखप्रकाशांत चालतात.
१६ ते तुझ्या नामामुळें नेहमीं उल्लास करितात;
तुझ्या न्यायपरायणतेनें त्यांची उन्नति होते.
१७ कारण त्यांच्या बलाचें वैभव तूं आहेस;
तुझ्या प्रसादानें आमचें शिंग उंच होतें.
१८ आमची ढाल परमेश्वराच्या मालकीची आहे;
आमचा राजा इस्राएलाच्या पवित्र प्रभूचा आहे.
१९ एके समयीं तूं आपल्या भक्तांशीं
दृष्टांतानें बोललास;
तूं म्हणालास, मीं एका वीराकडे साहाय्य करण्याचें सोपविलें आहे;
लोकांतून निवडलेल्या एकास मीं श्रेष्ठ पदास चढविलें आहे.
२० माझा सेवक दावीद मला मिळाला आहे;
मीं आपल्या पवित्र तेलानें त्याला अभिषेक केला आहे.
२१ त्याजबरोबर माझा हात सदा राहील;
माझा भुजहि त्याला बलवान् करील.
२२ शत्रु त्याला छळणार नाहीं;
दुष्ट जन त्याला पीडणार नाहीं.
२३ मी त्याच्यादेखत त्याच्या शत्रूंस मारून
चीत करीन,
त्याच्या द्वेष्ट्यांस मारून टाकीन.
२४ माझी सत्यता व माझी दया त्याजपाशीं राहतील;
माझ्या नामानें त्याचें शिंग उंच होईल.
२५ मी त्याचा हात समुद्रावर,
आणि त्याचा उजवा हात नद्यांवर ठेवीन.
२६ तो माझा धावा करून म्हणेल, तूं माझा पिता,
माझा देव, माझ्या तारणाचा दुर्ग आहेस.
२७ मी तर त्याला ज्येष्ठ करीन.
पृथ्वीवरील राजांत त्याला सर्वश्रेष्ठ करीन.
२८ मी आपली दया त्याजवर सर्वकाळ
कायम राखीन,
त्याजशीं केलेला माझा करार अढळ राहील.
२९ त्याची संतति सर्वकाळ राहील,
व त्याचें सिंहासन स्वर्गाच्या दिवसांप्रमाणें अः
राहील असें करीन.
३० जर त्याच्या वंशजांनीं माझें नियमशास्त्र सोडिलें,
माझ्या निर्णयांप्रमाणें ते चालले नाहींत,
३१ जर माझे नियम त्यांनीं उलंघिले,
माझ्या आज्ञा पाळिल्या नाहींत,
३२ तर मी त्यांच्या अधर्माचें शासन दंडानें करीन,
त्यांच्या अपराधाचें शासन फटक्यांनीं करीन;
३३ तरी त्याजवरील माझी दया मी दूर करणार नाहीं,
मी आपल्या सत्यवचनाचा भंग करणार नाहीं.
३४ मी आपला करार मोडणार नाहीं;
माझ्या मुखांतून जें निघालें तें मी बदलणार नाहीं.
३५ एकवार मीं आपल्या पवित्रतेची शपथ वाहिली आहे कीं
मी दाविदाला कदापि दगा देणार नाहीं;
३६ त्याची संतति सर्वकाळ राहील
व त्याचें सिंहासन माझ्यासमोर सूर्याप्रमाणें
कायम राहील;
३७ चंद्राप्रमाणें तें सर्वकाळ टिकेल;
आकाशांतील साक्षी विश्वसनीय आहे. [सेला]
३८ तरी पण तूं आपल्या अभिषिक्ताचा त्याग केला,
त्याचा अव्हेर केला, त्याजवर संतप्त झालास.
३९ तूं आपल्या सेवकाशीं केलेला करार
अवमानिला आहे,
त्याचा मुकुट धुळींत टाकून भ्रष्ट केला आहे.
४० तूं त्याचे सर्व तट मोडून टाकिले आहेत,
त्याच्या गढ्या जमीनदोस्त केल्या आहेत.
४१ सर्व येणारेजाणारे त्याला लुटतात;
तो आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांस निंदेचा विषय झाला आहे.
४२ त्याच्या शत्रूंचा उजवा हात तूं उंच केला आहे;
तूं त्याच्या सर्व वैऱ्यांस हर्षविलें आहे.
४३ तूं त्याच्या तरवारीची धार मोडिली आहे.

लढाईत त्याला टिकाव धरूं दिला नाहीं.
४४ तूं त्याला निस्तेज केलें आहे,
त्याचें सिंहासन तूं धुळीस मिळविलें आहे.
४५ त्याच्या तारुण्याचे दिवस तूं खुंटविले आहेत;
तूं त्याला लज्जेनें वेष्टिलें आहे. [ सेला ]
४६ हे परमेश्वरा, हें कोठवर चालणार ?
तूं सर्वकाळ लपून राहणार काय ?
तुझा संताप अग्नीसारखा कोठवर भडकत राहणार ?
४७ माझें आयुष्य किती अल्प आहे हें मनांत आण;
तूं सर्व मानवजाति निर्माण केली
ती व्यर्थच काय ?
४८ असा मनुष्य कोण आहे कीं
तो जीवंत राहील, मृत्यु पाहणार नाहीं ?
अधोलोकाच्या कबजांतून आपला जीव
कोण सोडवील ? [ सेला ]
४९ हे प्रभू, ज्यांविषयीं तूं दाविदाशीं आपल्या सत्यतेनें शपथ वाहिली,
तीं तुझीं पूर्वींचीं दयाकृत्यें कोठें आहेत ?
५० हे प्रभू, तुझ्या सेवकांची निंदा होत आहे ती मनांत आण;
सर्व थोर राष्ट्रांनीं केलेली माझी निंदा मी हृदयांत वागवीत आहें हें लक्षांत आण.
५१ हे परमेश्वरा, हे तुझे शत्रु निंदा करितात,
पदोपदीं तुझ्या अभिषिक्ताची निंदा करितात.
५२ परमेश्वर सदासर्वकाळ धन्यवादित असो.
आमेन, आमेन.

---

# भाग चवथा

## ९० [ देवाचा भक्त मोशे याची प्रार्थना ]

१ हे प्रभू, तूं पिढ्यानपिढ्या आम्हांस निजधाम आहेस.
२ पर्वत उत्पन्न झाले त्यापूर्वी,
तूं पृथ्वी व जग निर्माण केलीं त्यापूर्वी
तूं युगानुयुग देव आहेस.
३ तूं मनुष्याला पुन: मातीस मिळवितोस,
आणि म्हणतोस, अहो मानवांनो, परत या.
४ कारण तुझ्या दृष्टीनें सहस्र वर्षें कालच्या गेलेल्या दिवसासारखीं,
रात्रीच्या प्रहरासारखीं आहेत.
५ तूं पुराप्रमाणें मानवांस घेऊन जातोस,
त्यांना महानिद्रा लागते,
ते सकाळीं गवताप्रमाणें उगवतात;
६ सकाळीं तें तरारून वाढतें;
संध्याकाळीं तें कापल्यावर सुकून जातें.
७ कारण आम्ही तुझ्या क्रोधानें भस्म होतों,
तुझ्या संतापानें आम्ही घाबरून जातों.
८ तूं आमचे अपराध आपल्यापुढें ठेविले आहेत;
आमचीं गुप्त पातकें आपल्या मुखप्रकाशांत ठेविलीं आहेत.
९ तुझ्या क्रोधांत आमचे सर्व दिवस गुदरतात;
आम्ही आपलीं वर्षें मंदावणाऱ्या सुराप्रमाणें घालवितों.
१० आमचें आयुष्य सत्तर वर्षें,
शक्ति असल्यास फार तर ऐशीं वर्षें;
तरी त्यांचा डामडौल केवळ कष्टमय व दु:खमय आहे;
कारण तें लवकर सरतें आणि आम्ही
निघून जातों.
११ तुझ्या क्रोधाचें बल कोणाला समजतें ?
आणि तुझी योग्य भीति बाळगण्याइतकी कोणाला तुझ्या कोपाची जाणीव आहे ?
१२ ह्याकरितां आम्हांस आपले दिवस असे गणण्यास शिकीव कीं आम्हांस सुबुद्ध हृदय प्राप्त होईल.

१३ हे परमेश्वरा, किती वेळ लाविशील ?
आपलें मन पालट, आपल्या सेवकांवर करुणा कर.
१४ तूं आपल्या दयेचा प्रसाद आम्हांस प्रभातींच देऊन तृप्त कर
म्हणजे आम्ही हर्षभरित होऊन आपले सर्व दिवस आनंदांत घालवूं.
१५ जेवढे दिवस तूं आम्हांस पीडिलें,
जेवढीं वर्षे आम्हीं दुःख भोगिलें,
त्याच्या मानानें आम्हांस आनंदित कर.
१६ तुझी कृति तुझ्या सेवकांस,
तुझें वैभव त्यांच्या मुलांस प्रगट होऊं दे.
१७ परमेश्वर जो आमचा देव त्याचा प्रसाद आम्हांवर होवो;
आमच्या हातचें काम आम्हांसाठीं सिद्धीस ने,
आमच्या हातचें काम सिद्धीस ने.

## ९१

१ जो परात्पराच्या गुप्त स्थलीं वसतो,
तो सर्वसमर्थाच्या सावलींत राहील.
२ मी परमेश्वराला म्हणतों, तूं माझा आश्रय, तूं माझा दुर्ग,
तूं माझा देव, तुजवर मी भाव ठेवितों.
३ कारण तो पारध्याच्या पाशापासून,
घातक मरीपासून तुझा बचाव करील.
४ तो तुजवर पाखर घालील,
त्याच्या पंखांखालीं तुला आश्रय मिळेल;
त्याचें सत्य ढाल व कवच आहे.
५ रात्रीच्या समयींचें भय,
दिवसा सुटणारा बाण,
६ काळोखांत फिरणारी मरी,
भर दोन प्रहरीं नाश करणारी पटकी,
यांची तुला भीति वाटणार नाहीं.
७ तुझ्या बाजूस सहस्रावधि पडले,
तुझ्या उजव्या हातास लक्षावधि पडले,
तरी ती तुला भिडणार नाहीं;
८ मात्र तुझ्या डोळ्यांस ती दिसेल, आणि
दुर्जनांस प्राप्त होणारें प्रतिफल तुझ्या दृष्टीस पडेल.
९ कारण परमेश्वर माझा आश्रय आहे असें म्हणून
तूं परात्पराला निजधाम केलें आहे.
१० यास्तव कोणतेंहि अरिष्ट तुजवर येणार नाहीं,
कोणताहि व्याधि तुझ्या तंबूजवळ येणार नाहीं.
११ कारण तुझ्या सर्व मार्गांत तुझें रक्षण करण्याची
तुजविषयीं तो आपल्या दिव्यदूतांस आज्ञा देईल.
१२ तुझ्या पायांला धोंड्याची ठेच लागूं नये
म्हणून ते तुला आपल्या हातांवर झेलून धरतील.
१३ तूं सिंह व नाग यांवर पाय देऊन चालशील;
तरुण सिंह व अजगर यांस तुडवीत चालशील.
१४ त्याचें प्रेम मजवर आहे,
म्हणून मी त्याला मुक्त करीन;
त्याला माझ्या नामाची जाणीव आहे
म्हणून मी त्याला उच्च स्थळीं निर्भय ठेवीन.
१५ तो माझा धावा करील आणि मी त्याचें ऐकेन;
संकटसमयीं मी त्याच्याजवळ असेन;
मी त्याला मुक्त करीन, मी त्याचें गौरव करीन;
१६ त्याला दीर्घायुष्य देऊन तृप्त करीन,
त्याला मीं सिद्ध केलेल्या तारणाचा अनुभव घडवीन.

## ९२

[ शब्बाथ दिवशीं गावयाचें संगीत स्तोत्र ]

१ परमेश्वराचें उपकारस्मरण करणें,
हे परात्परा, तुझें नामसंकीर्तन करणें गोड आहे.
२ प्रभातसमयीं तुझें वात्सल्य,
प्रतिरात्रीं तुझी सत्यता वाखाणणें,
३ दशतंतुवाद्य, सतार व वीणा यांच्या साथीनें,
गंभीर स्वरानें गाणें गोड आहे.
४ कारण तूं, हे परमेश्वरा, आपल्या कृतीनें मला हर्षित केलें आहे;
तुझ्या हातच्या कृत्यांचा मी जयजयकार करितों.
५ हे परमेश्वरा, तुझीं कृत्यें किती थोर आहेत !
तुझे विचार फार गहन आहेत.
६ पशुवृत्तीचा मनुष्य हें जाणत नाहीं;

मूर्खाला हें समजत नाहीं;
७ दुर्जन गवताप्रमाणें उद्भवले
व सर्व दुष्कर्मी उत्कर्ष पावले,
म्हणजे त्यांचा कायमचा विध्वंस ठरलाच
म्हणून समजावें.
८ तूं तर, हे परमेश्वरा, सदासर्वकाळ
उच्चस्थानीं आहेस.
९ पाहा, हे परमेश्वरा, तुझे वैरी,
तुझे वैरी नाश पावतील;
सर्व दुष्कर्म्यांची दाणादाण होईल.
१० माझें शिंग तर तूं गव्याच्या शिंगाप्रमाणें उन्नत केलें आहे,
मला ताज्या तेलाचा अभ्यंग झाला आहे.
११ माझ्या शत्रूंच्या बाबतींत माझ्या डोळ्यांचें पारणें फिटलें आहे;
मजवर उठलेल्या दुष्कर्म्यांसंबंधानें माझे कान तृप्त झाले आहेत.
१२ धार्मिक खजुरीसारखा समृद्ध होईल,
तो लबानोनावरल्या गंधसरूसारखा वाढेल.
१३ जे परमेश्वराच्या मंदिरांत रोपलेले असतात
ते आपल्या देवाच्या अंगणांत समृद्ध होतील.
१४ वृद्धपणांतहि ते फळ देत राहतील;
ते रसभरित व टवटवीत असतील;
१५ यावरून दिसेल कीं परमेश्वर सरळ आहे;
तो माझा दुर्ग आहे, त्याच्या ठायीं
अधर्म मुळींच नाहीं.

## ९३

१ परमेश्वर राज्य करितो, तो ऐश्वर्यानें मंडित आहे;
परमेश्वरानें पेहराव चढविला आहे;
त्यानें बलरूप कमरबंद कसला आहे;
म्हणून पृथ्वी स्थिर आहे, डळमळत नाहीं.
२ तुझें सिंहासन अनादिकालापासून स्थिर आहे;
तूं सनातन आहेस.
३ हे परमेश्वरा, नद्यांनीं कल्लोळ केला आहे, महानाद केला आहे;
नद्यांनीं आपल्या लाटांची गर्जना केली आहे.
४ विपुल जलांच्या, महासागराच्या
प्रचंड लाटांच्या गर्जनेहून
उच्चस्थानीं असलेला परमेश्वर प्रतापशाली आहे.
५ तुझे निर्बंध अभंग आहेत;
हे परमेश्वरा, तुझ्या मंदिराला पावित्र्य सदैव शोभतें.

## ९४

१ हे पारिपत्य करणाऱ्या देवा, परमेश्वरा,
हे पारिपत्य करणाऱ्या
तूं आपलें तेज प्रगट कर.
२ हे पृथ्वीच्या न्यायाधीशा, ऊठ;
गर्विष्ठांस त्यांच्या कर्माचें प्रतिफल दे.
३ हे परमेश्वरा, दुर्जन कोठवर
दुर्जन कोठवर जयोत्सव करितील?
४ ते बडबड करितात, उद्धटपणें बोलतात,
सर्व दुष्कर्मी फुशारकी मारितात;
५ हे परमेश्वरा, ते तुझ्या लोकांचा चुराडा करितात,
तुझ्या वतनाला पीडितात.
६ ते विधवा व उपरी यांचा जीव घेतात,
अनाथांस ठार मारितात.
७ ते म्हणतात, परमेश पाहत नाहीं,
याकोबाचा देव लक्ष देत नाहीं.
८ अहो पशुतुल्य लोकहो, लक्ष द्या;
मूर्खांनो, तुम्ही कधीं शहाणे व्हाल?
९ ज्यानें कान घडला तो ऐकणार नाहीं काय?
ज्यानें डोळा घडला तो पाहणार नाहीं काय?
१० जो राष्ट्रांचा शास्ता, जो मानवांचा ज्ञानदाता,
तो शासन करणार नाहीं काय?
११ परमेश्वर मानवांचे विचार जाणतो,
ते तर केवळ वायफळ आहेत.
१२ हे परमेशा, ज्या मनुष्याला तूं शिस्त लावितोस,
ज्याला तूं आपल्या धर्मशास्त्रांतून शिकवितोस,
तो धन्य;
१३ अशा मनुष्याला तूं विपत्कालीं आराम देशील,

आणि तोंवर दुर्जनांकरितां खांच खणिली जाईल.
१४ कारण परमेश्वर आपल्या लोकांचा
त्याग करणार नाहीं;
तो आपलें वतन सोडून देणार नाहीं.
१५ न्याय धर्माच्या पक्षाचा होईल
आणि सात्विक मनाचे सर्व जन
तो अनुसरतील.
१६ माझ्यासाठीं दुष्कर्म्याविरुद्ध कोण उठेल ?
माझ्यासाठीं अधर्म करणाऱ्याविरुद्ध कोण
उभा राहील ?
१७ परमेश्वर मला साहाय्य झाला नसता
तर माझ्या जिवाची वस्ती निर्व्यापार स्थितींत
केव्हांच झाली असती.
१८ माझा पाय निसरला असें मी म्हणतों तोंच,
हे परमेश्वरा, तुझी दया मला आधार देते.
१९ माझें मन बहुत चिंताक्रांत होतें
तेव्हां तुजपासून लाभणारें सांत्वन माझ्या जिवाचें
समाधान करितें.
२० न्याय करण्याच्या मिषानें अरिष्ट योजणाऱ्या
अनर्थकारक न्यायासनाचा
तुजशीं कांहीं संबंध असेल काय ?
२१ ते धार्मिकाच्या जिवावर घाला घालितात,
आणि निर्दोष्यांस देहांत शिक्षा ठरवितात;
२२ पण परमेश्वर मला उंच गडासारखा आहे;
माझा देव मला आश्रयाचा दुर्ग आहे.
२३ तो त्यांचा अधर्म त्यांजवरच उलटवील;
त्यांच्या दुष्टपणामुळें तो त्यांस नाहींतसे करील;
आमचा देव परमेश्वर त्यांस नाहींतसे करील.

## ९५

१ याहो या, आपण परमेश्वराचा जयजय-
कार करूं या;
आपल्या तारणदुर्गाचा जयजयकार करूं.
२ उपकारस्मरण करीत आपण त्याजपुढें जाऊं,
स्तोत्रें गाऊन त्याचा जयजयकार करूं.
३ कारण परमेश्वर थोर देव आहे;
तो थोर राजा आहे, तो सर्व देवांहून श्रेष्ठ आहे.
४ त्याच्या हातीं पृथ्वीचीं खोल स्थलें आहेत;
पर्वतांचीं उंच शिखरेंहि त्याचींच आहेत.
५ समुद्र त्याचा आहे, त्यानेंच तो उत्पन्न केला;
कोरडी भूमिहि त्याच्याच हातानें रचिली गेली.
६ याहो या, परमेश्वर जो आपला उत्पन्नकर्ता
त्याच्यापुढें आपण गुडघे टेकूं;
त्याची भक्ति करूं, त्यापुढें नमन करूं.
७ कारण तो आपला देव आहे,
आणि आपण त्याच्या कुरणांतील प्रजा,
त्याच्या हातचा कळप आहों.
आज तुम्ही त्याची वाणी ऐकाल तर किती बरें होईल !
८ मरीबा येथल्याप्रमाणें,
रानांतील मस्सा प्रकरणाच्या दिवसांत केल्याप्रमाणें
तुम्ही आपलें मन कठीण करूं नका;
९ तेव्हां तुमच्या वडिलांनीं माझी परीक्षा पाहिली,
मला पारखिलें, माझी कृति पाहिली.
१० चाळीस वर्षें त्या पिढीचा मला वीट आला;
मी म्हणालों, हे भ्रांत मनाचे लोक आहेत;
त्यांनीं माझे मार्ग जाणिले नाहींत;
११ म्हणून मी रागानें शपथ वाहून म्हणालों,
हे माझ्या विश्रामस्थानीं निश्चयें यावयाचे नाहींत.

## ९६

१ परमेश्वराचें गुणगान नवें गीत गाऊन करा.
हे सर्व पृथ्वी, परमेश्वराचें गुणगान कर.
२ परमेश्वराचें गुणगान करा, त्याच्या नामाचा
धन्यवाद करा;
त्यानें केलेल्या तारणाची घोषणा प्रतिदिनीं करा.
३ राष्ट्रांमध्यें त्याचें गौरव,
सर्व लोकांमध्यें त्याचीं अद्भुत कृत्यें जाहीर करा.
४ कारण परमेश्वर थोर व परमस्तुत्य आहे;
सर्व दैवतांहून त्याचेंच भय धरणें योग्य आहे.
५ कारण राष्ट्रांचीं सर्व दैवतें निरुपयोगी[1] आहेत;
परमेश्वर आकाशाचा निर्माणकर्ता आहे.

१ अथवा : राष्ट्रांचे सर्व देव अवास्तव आहेत;

६ तेज व प्रताप हीं त्याजपुढें आहेत;
सामर्थ्य व शोभा हीं त्याच्या पवित्रस्थानीं आहेत;
७ अहो राष्ट्रकुलांनो, परमेश्वराचें गौरव करा;
परमेश्वराचें गौरव करा व त्याचें सामर्थ्य वाखाणा.
८ परमेश्वराच्या नामाची थोरवी गा;
अर्पण घेऊन त्याच्या अंगणांत या;
९ पावित्र्यानें युक्त होऊन
परमेश्वराची आराधना करा;
हे सर्व पृथ्वी, त्याजपुढें कंपायमान हो.
१० राष्ट्रांमधल्या लोकांस विदित करा कीं
परमेश्वर राज्य करितो.
जग स्थिर स्थापिलेलें आहे, तें डळमळत नाहीं.
तो सात्विकपणें लोकांचा न्याय करील.
११ आकाश हर्षो, पृथ्वी उल्लासो;
समुद्र व त्यांतील सर्व कांहीं गर्जना करोत;
१२ शेत व त्यांतील सर्व कांहीं उत्सव करोत;
म्हणजे वनांतील सर्व झाडें परमेश्वरासमोर
आनंदाचा गजर करितील;
१३ कारण तो आला आहे;
पृथ्वीचा न्यायनिवाडा करावयास तो आला आहे;
तो जगाचा न्यायनिवाडा यथार्थतेनें करील,
लोकांचा न्याय सत्यतेनें करील.

## ९७

१ परमेश्वर राज्य करितो; पृथ्वी उल्लासो;
द्वीपसमूह हर्षो.
२ ढग व घनमेघ त्याच्यासभोवतीं आहेत.
नीति व न्याय त्याच्या सिंहासनाचा आधार आहेत.
३ त्याजपुढें अग्नि चालतो,
तो आपल्यासभोवतालचे शत्रु जाळून टाकितो.
४ त्याच्या विजांनीं जग प्रकाशित केलें;
तें पाहून पृथ्वी कंपायमान झाली.
५ परमेश्वरासमोर, सर्व पृथ्वीच्या प्रभूसमोर
पर्वत मेणाप्रमाणें वितळले.
६ आकाशानें त्याची नीति जाहीर केली;
सर्व लोकांनीं त्याचें गौरव पाहिलें.
७ जे कोरींव मूर्तींची उपासना करितात,
जे अवास्तव देवांचा अभिमान बाळगितात,
ते सर्व लज्जित झाले.
अहो सर्व देवहो[1], त्याच्या चरणीं लागा.
८ हें ऐकून सीयोन हर्षित झालें;
हे परमेश्वरा, तुझ्या न्यायकृत्यांमुळें यहूदाच्या
कन्या उल्लसल्या.
९ कारण हे परमेश्वरा, तूं सर्व पृथ्वीच्याहून
अत्युच्च आहेस;
सर्व देवांहून तूं परमथोर आहेस.
१० अहो परमेश्वरावर प्रीति करणाऱ्यांनो, वाइटाचा
द्वेष करा;
तो आपल्या भक्तांचा प्राण रक्षितो;
तो त्यांस दुर्जनांच्या हातांतून सोडवितो.
११ धार्मिकांसाठीं प्रकाश व जे सात्विक मनाचे आहेत
त्यांच्यासाठीं हर्ष पेरिला आहे.
१२ अहो धार्मिक जनहो, परमेश्वराच्या ठायीं हर्ष करा;
त्याच्या पवित्र नामाचें कृतज्ञतापूर्वक स्तवन करा.

## ९८

[ स्तोत्र ]

१ परमेश्वराचें गुणगान नवें गीत गाऊन करा
कारण त्यानें अद्भुत कृत्यें केलीं आहेत;
त्याच्या उजव्या हातानें, त्याच्या पवित्र भुजानें
तारण साधिलें आहे.
२ परमेश्वरानें आपण सिद्ध केलेलें तारण विदित केलें
आहे; राष्ट्रांसमक्ष आपले न्यायीपण प्रगट केलें आहे.
३ इस्राएलाच्या घराण्यावरील आपली दया व
सत्यता यांचें त्यानें स्मरण केलें आहे;
पृथ्वीच्या सर्व सीमांनीं आमच्या देवानें सिद्ध केलेलें
तारण पाहिलें आहे.
४ अहो पृथ्वीवरील सर्व लोकहो,
परमेश्वराचा जयजयकार करा;
उच्च स्वरानें, आनंदानें, गा; त्याचीं स्तोत्रें गा.

१ अथवा : दिव्यदूतहो ( इब्री. १:६ पाहा )

५ परमेश्वराचें गुणगान वीणेवर करा,
वीणेवर सुस्वर स्तोत्र गा.
६ करणा व शिंग वाजवून
परमेश्वर राजासमोर जयघोष करा.
७ समुद्र व त्यांतील सर्व कांहीं,
जग व त्यांत राहणारे हीं हर्षनाद करोत.
८ नद्या टाळ्या वाजवोत;
पर्वत एकवटून परमेश्वरासमोर आनंदानें गावोत;
९ कारण तो पृथ्वीचा न्यायनिवाडा करावयास
आला आहे;
तो जगाचा न्यायनिवाडा यथार्थतेनें करील,
लोकांचा न्याय समतेनें करील.

# ९९

१ परमेश्वर राज्य करितो; लोक कंपित होवोत;
तो करूबारूढ आहे; पृथ्वी थरथरो.
२ परमेश्वर सीयोनांत थोर आहे;
तो सर्व लोकांहून परमथोर आहे.
३ ते तुझें थोर व भयप्रद नाम स्तवोत;
तो पवित्र आहे.
४ न्यायप्रिय राजाचें सामर्थ्य तूं सात्विकतेंत स्थिर
केलें आहे;
तूं याकोबांत न्याय व नीति यांचा प्रचार करितोस.
५ परमेश्वराची, आमच्या देवाची, थोरवी गा
व त्याच्या पादासनापुढें नमन करा;
तो पवित्र आहे.
६ त्याच्या याजकांपकीं मोशे व अहरोन,
आणि त्याच्या नामाचें स्मरण करणाऱ्यांपैकीं शमुवेल,
यांनीं परमेश्वराचा धावा केला आणि त्यांचें
त्यानें ऐकलें.
७ मेघस्तंभांतून तो त्यांजशीं बोलला;
त्याचे निर्बंध व त्यानें लावून दिलेला नियम हे
त्यांनीं पाळिले.
८ हे परमेश्वरा, आमच्या देवा, तूं त्यांचें ऐकलें;
तूं त्यांला क्षमा करणारा असा देव होतास,
तरी त्यांच्या कर्माबद्दल त्यांस शासन करीत असस.
९ परमेश्वर आपला देव याची थोरवी गा,
आणि त्याच्या पवित्र पर्वतापुढें नमन करा;
कारण परमेश्वर आमचा देव पवित्र आहे.

# १०० [ उपकार मानण्याचें स्तोत्र ]

१ अहो पृथ्वीवरील सर्व लोकहो,
परमेश्वराचा जयजयकार करा.
२ हर्षानें परमेश्वराची सेवा करा;
गायन करीत त्याजपुढें या.
३ परमेश्वर हाच देव आहे असें जाणा;
त्यानेंच आम्हांस उत्पन्न केलें;
आम्ही त्याचेच आहों,
आम्ही त्याची प्रजा, त्याच्या कुरणांतील कळप आहों.
४ त्याचें उपकारस्मरण करीत त्याच्या द्वारांत,
स्तवन करीत त्याच्या अंगणांत प्रवेश करा;
त्याचें उपकारस्मरण करा;
त्याच्या नामाचा धन्यवाद करा.
५ कारण परमेश्वर चांगला आहे;
त्याची दया युगानुयुग
आणि त्याची सत्यता पिढ्यानपिढ्या टिकते.

# १०१ [ दाविदाचें स्तोत्र ]

१ दया व न्याय यांविषयीं मी गाणें गाईन;
हे परमेश्वरा, मी तुझीं स्तोत्रें गाईन.
२ मी अव्यंग मार्गावरून सद्बुद्धीनें चालेन
तूं माझ्याजवळ केव्हां येशील ?
मी आपल्या घरीं सात्विक मनानें वागेन.
३ मी अनुचित गोष्ट आपल्या नेत्रांपुढें येऊं
देणार नाहीं;
अनाचाराचा मी तिरस्कार करितों,
तो मला बिलगणार नाहीं.
४ हृदयाची कुटिलता मला सोडून जाईल;
मी वाइटाशीं परिचय ठेवणार नाहीं.

५ आपल्या शेजाऱ्याची गुप्तपणें चहाडी करणाऱ्याचा
मी विध्वंस करीन;
जो कुरेंबाज व गर्विष्ठ मनाचा आहे त्याची मी
गय करणार नाहीं.
६ देशांतील भाविक जन मजजवळ राहावे म्हणून
मी त्यांजवर दृष्टि ठेवितों;
सात्विक मार्गानें चालणारा माझा सेवक होईल.
७ कपट करणाऱ्याला माझ्या घरांत थारा
मिळणार नाहीं;
असत्य बोलणारा माझ्या दृष्टीपुढें टिकणार नाहीं.
८ रोज सकाळीं मी देशांतल्या सर्व दुर्जनांचा विध्वंस
करीत जाईन,
म्हणजे परमेश्वराच्या नगरांतून अधर्म करणाऱ्या
सर्वांचा उच्छेद होईल.

## १०२

[व्याकुळ होऊन आपलें गाऱ्हाणें परमेश्वरापुढें मांडणाऱ्या दीनानें करावयाची प्रार्थना]

१ हे परमेश्वरा, माझी प्रार्थना ऐक,
माझी आरोळी तुजकडे पोहंचो.
२ माझ्या संकटाच्या दिवशीं तूं मजपासून आपलें मुख
लपवूं नको;
तूं आपला कान मजकडे लाव;
मी धावा करीन त्या दिवशीं माझें सत्वर ऐक.
३ माझे दिवस धुरासारखे विरून जातात,
माझीं हाडें चुलींतल्या निखाऱ्यासारखीं जळून
गेलीं आहेत.
४ माझें हृदय गवताप्रमाणें वाळून करपलें आहे,
म्हणून मला अन्न खाण्याचेंहि भान राहत नाहीं.
५ मोठ्यानें कण्हून कण्हून
माझी चामडी माझ्या हाडांला चिकटून गेली आहे;
६ मी रानांतल्या पाणकोळ्यासारखा झालों आहें;
वैराण प्रदेशांतील घुबडासारखा मी झालों आहें.
७ मी जागरण करीत आहें,
धाब्यावर एकटें राहणाऱ्या चिमण्यासारखा मी
झालों आहें.
८ माझे वरी दिवसभर माझी निंदा करितात;
मजवर खवळलेले इसम माझ्या नांवानें शाप देतात.
९ मीं राख भाकरीप्रमाणें खाली आहे,
व माझ्या पाण्यांत माझीं आसवें मिसळलीं आहेत.
१० याला कारण तुझा रोष, तुझा क्रोध, हें होय,
कारण तूं मला वर उचलून फेकून दिलें आहे.
११ माझे दिवस वाढत्या सावलीसारखे झाले आहेत;
गवताप्रमाणें मी वाळून गेलों आहें.
१२ हे परमेश्वरा, तूं सर्वकाळ सिंहासनारूढ आहेस;
तुझ्या नामाचें स्मरण पिढ्यानपिढ्या कायम राहील.
१३ तूं उठून सीयोनावर दया करिशील;
कारण त्याजवर कृपा करण्याचा समय आला आहे.
नेमिलेला समय येऊन ठेपला आहे;
१४ तुझ्या सेवकांचें चित्त त्याच्या दगडांकडे लागलें आहे.
त्याची धूळधाण पाहून ते हळहळतात.
१५ राष्ट्रें परमेश्वराच्या नामाला,
पृथ्वीवरचे सर्व राजे तुझ्या ऐश्वर्याला भितील;
१६ कारण परमेश्वरानें सीयोन पुनः बांधिलें आहे,
तो आपल्या गौरवानें प्रगट झाला आहे;
१७ त्यानें निराश्रितांच्या प्रार्थनेकडे लक्ष दिलें आहे;
त्यांची प्रार्थना त्यानें तुच्छ मानिली नाहीं.
१८ पुढच्या पिढीसाठीं हें लिहून ठेविलें जाईल;
पुढें उत्पन्न होणारी प्रजा परमेशाचें स्तवन करील;
१९ कारण त्यानें आपल्या पवित्र उच्चस्थानावरून
खालीं पाहून,
परमेश्वरानें आकाशांतून पृथ्वीकडे अवलोकन करून,
२० बंदिवानांचे उसासे ऐकले,
ज्यांचें मरण ठरलें होतें त्यांस सोडविलें;
२१ म्हणून ते सीयोनांत परमेश्वराच्या नामाचा जय-
जयकार करितील,
ते यरुशलेमांत त्याची स्तुति गातील.
२२ परमेश्वराची उपासना करावयास लोक व राज्यें
एकत्र होतील तेव्हां असें होईल.
२३ त्यानें माझी शक्ति मार्गांतच क्षीण केली;
त्यानें माझें आयुष्य कमी केलें.

२४ मी म्हणालों, हे माझ्या देवा,
माझा आयुष्यकाळ पुरा होण्यापूर्वी मला
घेऊन जाऊं नको;
तुझीं वर्षें पिढ्यानपिढ्यांत आहेत.
२५ तूं पुरातन काळीं पृथ्वीचा पाया घातला;
गगनें तुझ्या हातचें कृत्य आहे.
२६ तीं नाहींतशीं होतील, परंतु तूं निरंतर आहेस;
तीं सर्व वस्त्रासारखीं जीर्ण होतील;
तीं तूं पांघरुणासारखीं पालटशील
आणि तीं पालटतील;
२७ परंतु तूं तसाच राहतोस,
तुझ्या वर्षांना अंत नाहीं.
२८ तुझ्या सेवकांचे वंशज कायम टिकून राहतील,
त्यांची संतति तुजसमोर स्थायिक होईल.

# १०३

[ दाविदाचें स्तोत्र ]

१ हे माझ्या जिवा, परमेश्वराचा धन्यवाद कर:
हे माझ्या सर्व अंतर्यामा, त्याच्या पवित्र नामाचा
धन्यवाद कर.
२ हे माझ्या जिवा, परमेश्वराचा धन्यवाद कर,
त्याचे सर्व उपकार विसरूं नको;
३ तो तुझ्या एकंदर दुष्कर्मांची क्षमा करितो;
तो तुझे सर्व रोग बरे करितो;
४ तो तुझा जीव विनाशगर्तेतून उद्धरितो;
तो तुला दया व करुणा यांचा मुकुट घालतो;
५ तो तुझें आयुष्य उत्तम पदार्थांनीं तृप्त करितो;
म्हणून तुझें तारुण्य गरुडासारखें नवें होतें.
६ जाचलेल्या सर्वांकरितां
परमेश्वर नीतीचीं व न्याय्यत्वाचीं कृत्यें करितो;
७ त्यानें आपले मार्ग मोशाला
आणि आपलीं कृत्यें इस्राएलाच्या वंशजांला
विदित केलीं.
८ परमेश्वर कनवाळू व कृपाळू,
मंदक्रोध व दयामय आहे.
९ तो सर्वदाच दोष देत राहणार नाहीं;
तो आपला क्रोध सर्वकाळ राहूं देणार नाहीं.
१० आमच्या पातकांच्या मानानें त्यानें आमचें
पारिपत्य केलें नाहीं,
त्यानें आमच्या दुष्कर्मांच्या मानानें आम्हांस
प्रतिफल दिलें नाहीं.
११ कारण जसें पृथ्वीच्यावर आकाश फार उंच आहे,
तशी त्याची दया त्याचें भय धरणाऱ्यांवर
विपुल आहे.
१२ पश्चिमेपासून पूर्व जितकी दूर आहे,
तितके त्यानें आमचे अपराध आम्हांपासून दूर
केले आहेत.
१३ जसा बाप आपल्या मुलांवर ममता करितो,
तसा परमेश्वर आपलें भय धरणाऱ्यांवर
ममता करितो.
१४ कारण तो आमची प्रकृति जाणतो;
आम्ही केवळ माती आहों हें तो लक्षांत ठेवितो.
१५ मानवप्राण्याचें आयुष्य गवतासारखें आहे;
वनांतील फुलाप्रमाणें तो फुलतो.
१६ वारा त्यावरून गेला म्हणजे तें नाहींसें होतें,
आणि त्याचा त्या ठिकाणाशीं पुनरपि संबंध
जडत नाहीं;
१७ परंतु परमेश्वराची दया त्याचें भय धरणाऱ्यांवर
युगानुयुग असते,
आणि त्याच्या न्याय्यत्वाचा अनुभव त्यांच्या
पुत्रपौत्रांस घडतो;
१८ म्हणजे त्याचा करार जे पाळितात
आणि त्याच्या विधींचें स्मरण ठेवून त्यांप्रमाणें
चालतात त्यांस तो घडतो.
१९ परमेश्वरानें आपलें सिंहासन आकाशांत
स्थापिलें आहे;
त्याचें राज्य सर्वांवर आहे.
२० अहो परमेश्वराच्या दिव्यदूतांनो,
जे तुम्ही बलसंपन्न आहां,
आणि त्याचें आज्ञावचन ऐकून त्याप्रमाणें करितां,
ते तुम्ही त्याचा धन्यवाद करा.

२१ अहो परमेश्वराच्या सर्व सैन्यांनो,
जी तुम्ही त्याची सेवा करून त्याचा मनोदय सिद्धीस नेतां,
ती तुम्ही त्याचा धन्यवाद करा.
२२ परमेश्वराच्या साम्राज्यांतील सर्व ठिकाणचे त्याचे अखिल सृष्टपदार्थहो,
त्याचा धन्यवाद करा;
हे माझ्या जिवा, परमेश्वराचा धन्यवाद कर.

# १०४

१ हे माझ्या जिवा, परमेश्वराचा धन्यवाद कर.
हे परमेश्वरा, माझ्या देवा, तूं परम थोर आहेस;
तूं प्रताप व महिमा यांनीं मंडित आहेस.
२ तूं पोशाखाप्रमाणें प्रकाश धारण करितोस;
कनाथीप्रमाणें आकाश विस्तारितोस;
३ आपल्या माड्यांच्या तुळया जलाच्या ठायीं बसवितोस,
मेघांला आपला रथ करितोस,
वायूच्या पंखावर आरोहण करून जातोस;
४ वायूंला आपले दूत करितोस,
ज्वलित अग्नीला आपले सेवक करितोस.
५ तूं पृथ्वीला तिच्या पायावर अशी बसविली आहेस कीं
ती कधीं काळीं ढळणार नाहीं.
६ ती तूं वस्त्राप्रमाणें जलाशयानें आच्छादिली,
पर्वतांवर जलें राहिलीं;
७ तुझ्या धमकीनें तीं पळालीं,
तुझ्या गर्जनेच्या शब्दानें तीं त्वरेनें ओसरलीं;
८ तीं पर्वतांवरून जाऊन खालीं खोऱ्यांतून वाहिलीं,
त्यांच्यासाठीं तूं नेमलेल्या स्थळीं तीं जाऊन राहिलीं.
९ तूं मर्यादा ठरविली तिचें त्यांना उल्लंघन करितां येत नाहीं;
भूमि झाकावयाला त्यांना परत येववत नाहीं.
१० तो खोऱ्यांतून झरे काढितो;
ते डोंगरांमधून वाहतात;
११ ते सर्व वनपशूंस प्यावयाला पाणी पुरवितात:
त्यांवर रानगाढवें आपली तहान भागवितात.
१२ त्यांच्याजवळ आकाशांतील पक्षी वस्ती करितात;
ते वृक्षांच्या फांद्यांवरून गातात.
१३ तो आपल्या माड्यांवरून पर्वतांवर जलसिंचन करतो;
तुझ्या कृतींच्या फळानें भूमि तृप्त होते.
१४ तो जनावरांसाठीं गवत आणि मनुष्याच्या उपयोगासाठीं वनस्पति उगववितो;
अशा प्रकारें तो भूमींतून अन्न उत्पन्न करितो;
१५ म्हणजे मनुष्याचें अंतःकरण आनंदित करणारा द्राक्षारस,
मुख टवटवीत करणारें तेल,
मनुष्याच्या जिवाला आधार देणारी भाकर,
हीं तो उत्पन्न करितो.
१६ परमेश्वराचे वृक्ष, लबानोनावर त्यानें लाविलेले गंधसरू,
हे रसभरित असतात;
१७ त्यांवर पक्षी आपलीं घरटीं करितात;
करकोचा पक्ष्याचें घर देवदारूंमध्यें असतें.
१८ उंच पर्वत रानबकऱ्यांसाठीं आहेत.
कडे सशांचें आश्रयस्थान आहेत.
१९ त्यानें कालमान समजण्यासाठीं चंद्र नेमिला;
सूर्य आपला अस्तसमय समजून घेतो.
२० तूं अंधार करितोस तेव्हां रात्र होते;
तींत सर्व जातींचे वनपशु संचार करितात;
२१ तरुण सिंह स्वभक्ष्यामागून गर्जना करीत धावतात,
देवाजवळ आपलें अन्न मागतात.
२२ सूर्य उगवतो तेव्हां ते परत जाऊन
आपआपल्या गुहांत निजून राहतात.
२३ मनुष्य आपल्या कामधंद्यास जाऊन
संध्याकाळपर्यंत श्रम करितो.
२४ हे परमेश्वरा, तुझीं कृत्यें किती अगणित आहेत!
तीं सर्व तूं चातुर्यानें केलीं;
तुझ्या संपत्तीनें पृथ्वी परिपूर्ण आहे.

२५ तो पलीकडचा समुद्र पाहा, तो अफाट व
विस्तीर्ण आहे,
त्यांत लहानमोठे असंख्य जलचर विहार करितात.
२६ पाहा, त्यांत गलबतें चालतात;
त्यांत क्रीडा करण्यासाठीं तूं निर्मिलेला लिव्याथान[1]
तेथें आहे.
२७ तूं त्यांस यथाकालीं भक्ष्य देशील
म्हणून ते सर्व तुझी वाट पाहतात.
२८ जें तूं त्यांस घालितोस तें ते घेतात;
तूं आपली मूठ उघडितोस
तेव्हां उत्तम पदार्थांनी त्यांची तृप्ति होते.
२९ तूं आपलें तोंड लपवितोस
तेव्हां ते व्याकुल होतात;
तूं त्यांचा श्वास काढून घेतोस
तेव्हां ते मरून मातीस मिळतात.
३० तूं आपला आत्मा पाठवितोस
तेव्हां ते उत्पन्न होतात;
तूं पृथ्वीचा पृष्ठभाग पुनः नवा करितोस.
३१ परमेश्वराचें वैभव चिरकाल राहो !
परमेश्वराला आपल्या कृतींपासून आनंद होवो !
३२ तो पृथ्वीकडे अवलोकन करितो तेव्हां ती कांपते;
तो पर्वतांस स्पर्श करितो तेव्हां ते धुमसतात.
३३ माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत परमेश्वराचें
गुणगान गाईन;
मी जीवंत आहें तोंपर्यंत
माझ्या देवाचें स्तोत्र गाईन.
३४ मीं केलेलें त्याचें ध्यान त्याला गोड लागो;
परमेश्वराच्या ठायीं मी हर्ष पावेन.
पृथ्वीवरून पातकी नष्ट होवोत;
यापुढें दुर्जन न उरोत.
हे माझ्या जिवा, परमेश्वराचा धन्यवाद कर.
परमेश्वराला स्तवा.[2]

१ म्हणजे देवमासा
२ मुळांत : हालेलूया.

१०५

१ परमेश्वराचें उपकारस्मरण करा, त्याचें
नाम घ्या;
राष्ट्रांस त्याचीं कृत्यें जाहीर करा.
२ त्याचें गुणगान करा, त्याला त्याचीं स्तोत्रें गा;
त्याच्या सर्व अद्भुत कृत्यांचें वर्णन करा.
३ त्याच्या पवित्र नामाचा अभिमान बाळगा;
ज्यांना परमेश्वराचा ध्यास लागला आहे त्यांचें
हृदय हर्षित होवो.
४ परमेश्वर व त्याचें सामर्थ्य यांवर भरंवसा ठेवा;
त्याच्या दर्शनाविषयीं सदा आतुर असा.
५ त्यानें केलेलीं अद्भुत कृत्यें, त्याचे चमत्कार,
व त्यानें उच्चारिलेले निर्णय आठवा,
६ त्याचा सेवक अब्राहाम याचे वंशजहो,
त्यानें निवडलेल्या याकोबाचे वंशजहो,
तुम्ही असें करा.
७ तो परमेश्वर आमचा देव आहे;
त्याचीं न्यायकृत्यें सर्व पृथ्वीभर आहेत.
८ तो आपल्या करारांचें निरंतर स्मरण करितो,
हजारों पिढ्यांसाठीं आज्ञापिलेलें आपलें वचन
तो आठवतो;
९ हा करार त्यानें अब्राहामाशीं केला
आणि त्याविषयीं इसहाकाजवळ शपथ वाहिली;
१० ती त्यानें याकोबासाठीं नियम,
इस्राएलासाठीं सर्वकाळचा करार या रूपानें
कायम केली;
११ तो म्हणाला, कनान देश
तुझा वतनभाग म्हणून तुला देईन.
१२ त्या वेळीं ते मोजके, फार थोडके होते,
व तेहि त्या देशांत उपरी असे होते.
१३ ते राष्ट्रांराष्ट्रांतून,
एका राज्यांतून दुसऱ्या लोकांत हिंडले.
१४ त्यानें कोणत्याहि मनुष्याला त्यांस उपद्रव करूं
दिला नाहीं,

त्यांजकरितां त्यानें राजांचाहि निषेध करून म्हटलें कीं
१५ माझ्या अभिषिक्तांस हात लावूं नका,
माझ्या संदेष्ट्यांस उपद्रव करूं नका.
१६ त्यानें देशावर दुष्काळ आणिला;
त्यांचा अन्नाचा आधार अगदीं तोडून टाकिला.
१७ त्यांच्यापुढें त्यानें एक मनुष्य पाठविला;
योसेफ दास म्हणून विकला गेला;
१८ त्यांनीं बेड्या घालून त्याच्या पायांला इजा केली;
लोखंड त्याच्या जिव्हारी लागलें;
१९ त्याच्या सांगण्याप्रमाणें घडून येईपर्यंत,
परमेश्वराच्या वचनानें त्याला पारखिलें.
२० राजानें माणसें पाठवून त्याला सोडविलें;
राष्ट्रांच्या अधिपतीनें त्याला मुक्त केलें.
२१ त्यानें त्याला आपल्या घरचा मुखत्यार,
आपल्या सर्व संपत्तीवर अधिकारी नेमिलें,
२२ अशासाठीं कीं त्यानें आपल्या मर्जीस येईल
त्याप्रमाणें त्याच्या सरदारांना बांधावें,
त्याच्या मंत्र्यांस बुद्धिवाद सांगावा.
२३ नंतर इस्राएल मिसर देशांत आला;
याकोब हामाच्या देशांत उपरी म्हणून राहिला.
२४ परमेश्वरानें आपले लोक फार वाढविले,
त्यांच्या शत्रूंपेक्षां त्यांना बलिष्ठ केलें.
२५ आपल्या लोकांचा द्वेष करावा
आणि आपल्या सेवकांशीं कपटानें वागावें
म्हणून त्यानें त्यांच्या शत्रूंचें मन फिरविलें.
२६ त्यानें आपला सेवक मोशे
व आपण निवडलेला अहरोन यांस पाठविलें.
२७ त्यांनीं त्यांजमध्यें परमेश्वराचीं चिन्हें,
हामाच्या देशांत अद्भुत कृत्यें करून दाखविलीं.
२८ त्यानें अंधकार पाठवून काळोख पाडला;
आणि त्यांनीं त्यांच्या आज्ञांचें उल्लंघन केलें नाहीं.
२९ त्यानें मिसऱ्यांचें पाणी पालटून रक्त केलें
व त्यांतील मासे मारून टाकिले.
३० त्यांचा देश, त्यांचे राजवाडे
बेडकांनीं व्यापून टाकिले.
३१ त्यानें आज्ञा करितांच गोमाशा आल्या,
त्यांच्या सर्व प्रदेशांत उवा झाल्या.
३२ त्यानें पावसाऐवजी त्यांच्यावर गारा पाडिल्या;
त्यांच्या देशावर अग्नीचे लोळ पाठविले.
३३ त्यानें त्यांचे द्राक्षवेल व अंजीर
यांचा विध्वंस केला,
त्यांच्या देशांतील झाडें मोडून टाकिलीं.
३४ त्यानें आज्ञा करितांच
टोळ व असंख्य घुलीं आलीं.
३५ त्यांनीं त्यांच्या देशांतील सर्व हिरवळ,
त्यांच्या भूमीचें उत्पन्न खाल्लें.
३६ त्यानें त्यांच्या देशांतील प्रत्येक प्रथम जन्मलेला
म्हणजे त्यांच्या संपूर्ण पौरुषाचें प्रथम फळ मारिलें.
३७ त्यानें लोकांस सोन्यारुप्यासुद्धां बाहेर नेलें;
त्यांच्या लोकांच्या वंशांत कोणी दुर्बल नव्हता.
३८ त्यांच्या जाण्यानें मिसरी लोक आनंद पावले,
कारण त्यांचें भय त्यांला पडलें होतें.
३९ त्यांच्यावर छत्र होण्यासाठीं त्यानें ढग पसरिला,
आणि रात्रीस प्रकाश देण्यासाठीं अग्नि दिला.
४० त्यांनीं अन्न मागितलें तेव्हां त्यानें लावे पक्षी आणिले,
आणि स्वर्गीय अन्नानें त्यांस तृप्त केलें.
४१ त्यानें खडक फोडिला तों पाणी निघालें.
तें नदी होऊन रुक्ष प्रदेशांत वाहूं लागलें.
४२ कारण त्याला आपल्या पवित्र वचनाची
व आपला सेवक अब्राहाम याची आठवण होती.
४३ त्यानें आपल्या लोकांस आनंद करीत,
आपल्या निवडिलेल्या लोकांस जयोत्सव करीत
बाहेर आणिलें.
४४ त्यानें त्यांस परक्या राष्ट्रांचे देश दिले;
त्या लोकांचें श्रमफल त्यांच्या हातीं आलें,
४५ यासाठीं कीं आपले नियम त्यांनीं पाळावे,
आपल्या धर्मशास्त्राप्रमाणें वागावें.
परमेश्वराला स्तवा.

1 मुळांत : हालेलूया

१०६ [1] परमेश्वराला स्तवा.
परमेश्वराचें उपकारस्मरण करा, कारण
तो चांगला आहे;
त्याची दया सनातन आहे.
२ परमेश्वराचे पराक्रम कोण वर्णूं शकेल?
त्याची सर्व स्तुति कोणाला निवेदन करितां येईल?
३ जे त्याच्या न्यायानुसार वागतात,
आणि सर्वदा नीति आचरितात, ते धन्य!
४ हे परमेश्वरा, तूं आपल्या लोकांवर प्रसन्न आहेस,
त्यांत माझी गणना कर;
माझ्या उद्धारार्थ मला दर्शन दे;
५ म्हणजे तुझ्या निवडिलेल्यांचा उत्कर्ष माझ्या
दृष्टीस पडेल,
तुझ्या लोकांच्या आनंदानें मी आनंदित होईन.
तुझ्या वतनाच्या लोकांबरोबर मी उत्साह करीन.
६ आम्हीं आपल्या पूर्वजांप्रमाणें पाप केलें आहे,
आम्हीं अधर्म केला आहे, आम्हीं दुष्कर्म केलें आहे.
७ आमच्या पूर्वजांनीं मिसर देशांत असतां
तुझ्या अद्भुत कृत्यांकडे लक्ष पुरविलें नाहीं,
तुझ्या उदंड उपकारांचें स्मरण केलें नाहीं,
तर समुद्राजवळ, तांबड्या समुद्राजवळ,
ते फितुर झाले.
८ तरी आपला पराक्रम विदित करावा म्हणून,
त्यानें आपल्या नामास्तव त्यांचें तारण केलें.
९ त्यानें तांबड्या समुद्राला धमकाविलें आणि तो
कोरडा झाला,
आणि जसें काय मैदानावरून चालावें
तसें त्या जलाशयाच्या खोल स्थलांवरून त्यानें
त्यांस चालविलें.
१० त्यानें त्यांस त्यांचा द्वेष करणाऱ्याच्या
हातून सोडविलें.
शत्रूच्या हातून त्यांस मुक्त केलें.
११ त्यांचे वैरी पाण्यांत गडप झाले,
त्यांतला कोणीहि उरला नाहीं.
१२ तेव्हां त्यांनीं त्याच्या वचनांवर विश्वास ठेविला;
त्यांनीं त्याचीं स्तोत्रें गाइलीं.
१३ तरी ते त्याचीं कृत्यें लवकरच विसरले;
त्याच्या योजनेसंबंधानें त्यांनीं धीर धरिला नाहीं.
१४ रानांत त्यांची वासना अनावर झाली;
ओसाड प्रदेशांत त्यांनीं देवाची परीक्षा पाहिली.
१५ तेव्हां त्यानें त्यांच्या मागण्याप्रमाणें त्यांस दिलें,
पण त्यांचा जीव झुरणीस लाविला.
१६ त्यांनीं छावणींत मोशे
व परमेश्वराचा पवित्र सेवक अहरोन याजशीं हेवा
केला.
१७ तेव्हां भूमि फाटली व तिनें दाथानाला
गिळून टाकिलें,
आणि अबीरामाच्या टोळीस गडप केलें;
१८ त्यांच्या टोळीस अग्नीनें पछाडिलें,
आगीच्या लोळानें त्या दुर्जनास जाळून टाकिलें.
१९ त्यांनीं होरेबांत वासराची मूर्ति केली,
ओतींव मूर्तीची पूजा केली.
२० त्यांनीं परमेश्वर जो त्यांचें ऐश्वर्य
त्याच्याऐवजीं गवत खाणाऱ्या बैलाची
प्रतिमा स्वीकारिली.
२१ ते आपल्या उद्धारक देवाला विसरले;
त्यानें मिसर देशांत महत्कृत्यें,
२२ हामाच्या देशांत अद्भुत कृत्यें,
तांबड्या समुद्राजवळ भयंकर कृत्यें केलीं होतीं.
२३ तेव्हां तो म्हणाला, यांचा नाश केला पाहिजे;
पण त्याचा क्रोध शांत करावा,
व त्यानें त्यांचा नाश करूं नये,
म्हणून त्याचा निवडलेला मोशे त्यास
आड आला.
२४ त्यांनीं रम्य देश तुच्छ मानिला;
त्यांनीं त्याच्या वचनावर विश्वास ठेविला नाहीं.
२५ त्यांनीं आपल्या तंबूंत कुरकुर केली,
परमेश्वराचा शब्द मानिला नाहीं.

१ **मुळांत:** हालेलूया.

२६ तेव्हां त्यानें आपला हात वर करून त्यांजविषयीं
शपथ वाहिली कीं
मी त्यांस रानांत आपटीन,
२७ त्यांची संतति राष्ट्रांत विखरीन,
त्यांस देशोधडीस लावीन.
२८ ते बाल-पौरावर आसक्त झाले;
त्यांनीं निर्जीव मूर्तींना वाहिलेले बळी खाल्ले.
२९ त्यांनीं आपल्या कर्मांनीं त्याला क्रोध आणिला
म्हणून त्यांच्यामध्यें पटकी उठली.
३० तेव्हां फीनहासानें पुढें होऊन मध्यस्थी केली;
आणि पटकी बंद झाली.
३१ हें त्याचें करणें न्यायाचें
असें पिढ्यानपिढ्या सर्वकाळ गणिलें गेलें.
३२ मरीबाच्या जलाजवळहि त्यांनीं त्याला संतापविलें,
आणि त्यांच्यामुळें मोशावर अरिष्ट आलें;
३३ कारण त्यांनीं देवाच्या आत्म्याशीं विरोध केला,
आणि मोशानें अविचाराचे शब्द तोंडांतून काढिले.
३४ परमेश्वराची आज्ञा उलंघून
त्यांनीं विधर्मी राष्ट्रांचा विध्वंस केला नाहीं,
३५ तर ते त्या राष्ट्रांत मिसळले,
आणि त्यांचे आचार शिकले.
३६ त्यांनीं त्यांच्या मूर्तींची पूजा केली;
त्या त्यांस पाशरूप झाल्या.
३७ त्यांनीं आपले पुत्र व आपल्या कन्या
यांचे बळी भूतांला दिले;
३८ त्यांनीं निरपराध्यांचा रक्तपात केला,
म्हणजे आपले पुत्र व कन्या यांचें रक्त पाडिलें;
त्यांनीं कनानाच्या मूर्तींस त्यांचे बळी दिले;
असें करून त्यांनीं रक्तानें भूमि विटाळिली.
३९ ते आपल्या कर्मांनीं भ्रष्ट झाले;
ते आपल्या कृतीनें अनाचारी बनले.
४० त्यामुळें परमेश्वराचा कोप त्याच्या
लोकांवर भडकला;
त्याला आपल्या वतनाचा वीट आला.
४१ त्यानें त्यांस परराष्ट्रांच्या हातीं दिलें;
त्यांच्या द्वेष्ट्यांनीं त्यांजवर राज्य केलें.
४२ त्यांच्या शत्रूंनीं त्यांस छळिलें;
ते त्यांच्या हाताखालीं दडपून गेले.
४३ बहुत वेळां त्यानें त्यांस मुक्त केलें
तरी ते आपला हेका न सोडितां बंडखोरच राहिले,
व आपल्या अधर्मानें अधोगतीस पोहंचले.
४४ तथापि त्यांची आरोळी ऐकून
परमेश्वरानें त्यांच्या संकटाकडे दृष्टि पुरविली;
४५ त्यानें आपल्या कराराचें स्मरण त्यांच्या-
साठीं करून
आपल्या अपार दयेनें त्यांची कींव केली.
४६ त्यांचा पाडाव करणाऱ्या सर्वांच्या मनांत
त्यांजविषयीं त्यानें दया उत्पन्न केली.
४७ हे परमेश्वरा, आमच्या देवा, आम्हांस तार,
आम्हांस राष्ट्रांतून काढून एकवट कर,
म्हणजे आम्ही तुझ्या पवित्र नामाचें
स्तवन करूं,
तुझ्या स्तवनांतच आम्हांला उल्लास वाटेल.
४८ इस्राएलाचा देव परमेश्वर याचा
अनादिकालापासून अनंतकालपर्यंत धन्यवाद होवो.
सर्व लोक आमेन म्हणोत.
परमेश्वराला स्तवा.

१ मुळांत : हालेलूया.

# भाग पांचवा

## १०७

१ परमेश्वराचें उपकारस्मरण करा; तो
चांगला आहे;
त्याची दया सनातन आहे;
२ परमेश्वरानें उद्धरिलेले जन असें म्हणोत,
कारण त्यानें त्यांस शत्रूच्या तावडींतून मुक्त केलें
आहे;

३ त्यांस निरनिराळ्या देशांतून, पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण
या दिशांकडून आणून एकवट केलें आहे.
४ ते अरण्यांत वैराण प्रदेशांतील वाटेनें भटकले;
त्यांस वस्तीचें नगर आढळलें नाहीं.
५ ते भुकेले व तान्हेले असल्यामुळें
त्यांचा जीव त्यांच्याठायीं व्याकुळ झाला.
६ तेव्हां त्यांनीं संकटसमयीं परमेश्वराचा धावा केला,
आणि त्यानें त्यांस क्लेशांतून मुक्त केलें.
७ वस्तीच्या नगरास त्यांनीं जावें
म्हणून त्यानें त्यांस नीट मार्गानें चालविलें.
८ परमेश्वराच्या दयेस्तव व त्यानें मनुष्यांसाठीं केलेल्या अद्भुत कृत्यांस्तव
लोक त्याचें उपकारस्मरण करोत.
९ तो तान्हेल्या जिवास तृप्त करितो,
भुकेल्या जिवास उत्तम पदार्थांनीं संतुष्ट करितो.
१० जे क्लेशानें व बेड्यांनीं जखडले होते,
जे अंधकारांत व मृत्युच्छायेंत बसले होते,
११ ज्यांनीं देवाच्या आज्ञांविरुद्ध बंडाळी करून
परात्पराचा बोध तुच्छ मानिला होता,
१२ त्यांस कष्ट देऊन त्यानें त्यांचा ताठा उतरिला;
ते पतन पावले, त्यांस साहाय्य करण्यास कोणी नव्हता;
१३ तेव्हां त्यांनीं संकटसमयीं परमेश्वराचा धावा केला,
आणि त्यानें त्यांस क्लेशांतून मुक्त केलें.
१४ त्यानें त्यांस अंधकारांतून व मृत्युच्छायेंतून बाहेर आणिलें
व त्यांची बंधनें तोडून टाकिलीं.
१५ परमेश्वराच्या दयेस्तव व त्यानें मनुष्यांसाठीं केलेल्या अद्भुत कृत्यांस्तव
लोक त्याचें उपकारस्मरण करोत.
१६ त्यानें पितळेचीं दारें फोडिलीं
व लोखंडाचे अडसर तोडून टाकिले.
१७ अविचाऱ्यांना त्यांच्या दुराचरणामुळें
व त्यांच्या दुष्कर्मांमुळें पीडा भोगावी लागते.
१८ त्यांच्या जिवाला सर्व प्रकारच्या अन्नाचा वीट येतो;
ते मृत्युद्वारांजवळ पोहंचतात.
१९ ते संकटसमयीं परमेश्वराचा धावा करितात,
आणि तो त्यांस क्लेशांतून मुक्त करितो.
२० तो आपला संदेश पाठवून त्यांस बरें करितो,
नाशापासून त्यांचा बचाव करितो.
२१ परमेश्वराच्या दयेस्तव व त्यानें मनुष्यांसाठीं केलेल्या अद्भुत कृत्यांस्तव
लोक त्याचें उपकारस्मरण करोत.
२२ ते त्याला उपकारस्मरणरूपी यज्ञ अर्पोत,
व स्तोत्रें गाऊन त्याचीं कृत्यें वर्णोत.
२३ जे गलबतांत बसून समुद्रांतून प्रवास करितात,
महाजलांत उद्योगधंदा करितात,
२४ ते परमेश्वराचीं कृत्यें,
त्याचीं अद्भुत कृत्यें, भरसमुद्रांत पाहतात.
२५ तो आज्ञा करून वादळ उठवितो
तेव्हां त्याच्या लाटा उसळतात.
२६ ते आभाळापर्यंत वर जातात, तळापर्यंत खालीं जातात;
क्लेशानें त्यांच्या जिवाचें पाणी पाणी होतें.
२७ ते मद्यप्यासारखे झोके व भेलकंड्या खातात,
त्यांची बुद्धि अगदीं खुंटते.
२८ ते संकटसमयीं परमेश्वराचा धावा करितात,
आणि तो त्यांस क्लेशांतून मुक्त करितो.
२९ तो वादळ शमवितो
तेव्हां लाटा शांत होतात.
३० त्या शांत झाल्यामुळें ते हर्षित होतात,
आणि तो त्यांस इच्छित बंदरास नेतो.
३१ परमेश्वराच्या दयेस्तव व त्यानें मनुष्यांसाठीं केलेल्या अद्भुत कृत्यांस्तव
लोक त्याचें उपकारस्मरण करोत.
३२ लोकसभेंत ते त्याची थोरवी गावोत,
आणि वडिलांच्या बैठकींत त्याचें स्तवन करोत,
३३ तो नद्यांचें अरण्य करितो,
पाण्याच्या झऱ्यांच्या जागीं शुष्क भूमि करितो.

३४ सुपीक देशाची त्यांत राहणाऱ्यांच्या दुष्टतेमुळें तो
खारट भूमि करितो.
३५ तो अरण्याचें तळें करितो,
व शुष्क भूमीचे झरे करितो.
३६ तेथें तो भुकेल्यांस वसवितो,
ते वस्तीकरितां नगर तयार करितात;
३७ ते शेतें पेरितात,
व द्राक्षांचे मळे लावितात आणि त्यांस
पीक मिळतें.
३८ तो त्यांस आशीर्वाद देतो, आणि त्यांची फार
वाढ होते;
त्यांला गुरांची कमतरता पडूं देत नाहीं.
३९ पुढें जुलूम, विपत्ति व दुःख यांच्यामुळें
ते कमी होतात व खालावतात.
४० तो अधिपतींवर अपमानाचा मारा करितो;
त्यांला मार्गहीन वैराण प्रदेशांत
भटकावयास लावितो.
४१ पण दरिद्र्यांस क्लेशांतून मुक्त करून तो उच्च
स्थानीं ठेवितो,
त्यांचीं कुटुंबें मेंढरांच्या कळपासारखीं वाढवितो.
४२ हें पाहून सुजन हर्ष पावतात;
सर्व दुष्टाई आपलें तोंड बंद करिते.
४३ जो कोणी बुद्धिमान् असेल त्यानें ह्या गोष्टींकडे
लक्ष पुरवावें,
त्यानें परमेश्वराची दया ओळखावी.

## १०८ [ दाविदाचें संगीत स्तोत्र ]

१ हे देवा, माझें मन स्थिर आहे;
मी गाईन, मी जिवेंभावें स्तोत्र गाईन.
२ हे सतारी, हे वीणे, जागृत व्हा;
मी प्रभातेला जागें करीन.
३ हे परमेश्वरा, लोकांमध्यें मी तुझें
उपकारस्मरण करीन;
राष्ट्रांमध्यें तुझीं स्तोत्रें गाईन.
४ कारण तुझी दया आकाशाहून उंच आहे.
तुझें सत्य गगनापर्यंत जाऊन पोहंचलें आहे.
५ हे देवा, तूं आकाशाहून उन्नत हो;
तुझ्या गौरवाची प्रतिष्ठा सर्व पृथ्वीवर वाढो.
६ तुझ्या प्रियजनांनीं मुक्त व्हावें
म्हणून तूं आपल्या उजव्या हातानें त्यांचें तारण
कर, आणि आमचें ऐक.
७ देव आपल्या पवित्रतेला स्मरून म्हणाला,
मी उल्लासेन;
मी शखेम विभागीन व सुक्कोथाचें खोरें
मापून देईन.
८ गिलाद माझा आहे व मनश्शे माझा आहे;
एफ्राईम माझें शिरस्त्राण आहे;
यहूदा माझें राजवेत्र आहे.
९ मवाब माझें स्नानाचें गंगाळ आहे;
अदोमावर मी आपलें पायतण फेकीन;
पलेशेथाविषयीं मी जयघोष करीन.
१० मला तटबंदीच्या नगरांत कोण घेऊन जाईल ?
अदोमांत मला कोण नेईल ?
११ हे देवा, तूं आमचा त्याग केला ना !
हे देवा, तूं आमच्या सैन्यांबरोबर चालत नाहींस.
१२ शत्रूपासून तूं आमची सुटका कर;
मनुष्याचें साहाय्य केवळ व्यर्थ आहे.
१३ देवाच्या साहाय्यानें आम्ही पराक्रम करूं;
तोच आमच्या शत्रूंस तुडवून टाकील.

## १०९ [ मुख्य गवय साठीं; दाविदाचें स्तोत्र ]

१ हे माझ्या स्तुतिपात्र देवा, मौन धरूं नको;
२ कारण दुष्टांनीं व कपटी जनांनीं मजवर तोंड
सोडिलें आहे;
ते खोडसाळ जिव्हेनें मजविरुद्ध बोलले आहेत.
३ त्यांनीं मजवर द्वेषयुक्त शब्दांचा वर्षाव केला आहे,
ते मजशीं विनाकारण झगडले.
४ मी प्रेम करीत असतां ते माझा विरोध करितात;
मी तर प्रार्थनेंत मग्न असतों.
५ मीं केलेल्या बऱ्याची फेड त्यांनीं वाइटानें केली,

व माझ्या प्रेमाची फेड द्वेषानें केली.
६ त्याजवर दुर्जनाला अधिकारी नेम;
त्याच्या उजव्या हाताकडे विरोधी उभा राहो.
७ त्याचा न्याय होईल तेव्हां तो अपराधी ठरो,
आणि त्याची प्रार्थना पापरूप ठरो.
८ त्याचे दिवस थोडे होवोत;
त्याचा हुद्दा दुसरा घेवो.
९ त्याचीं मुलें अनाथ होवोत,
व त्याची बायको विधवा होवो.
१० त्याचीं मुलें भटकत फिरोत,
आणि तीं आपल्या उजाड झालेल्या वस्तीतून बाहेर पडून अन्नान्न करोत.
११ सावकार त्याचें सर्वस्व हिरावून घेवो;
त्याची कष्टाची कमाई परके लुटोत.
१२ त्याजवर कोणीहि दया न करो;
त्याच्या अनाथ मुलांची कींव कोणालाहि न येवो.
१३ त्याचा कुलक्षय होवो;
पुढल्या पिढींत त्याचा नामनिर्देश न होवो.
१४ त्याच्या वडिलांच्या अधर्माचें परमेश्वराला स्मरण राहो;
त्याच्या आईचें पातक पुसून न जावो.
१५ त्यांचीं पातकें परमेश्वरापुढें सदा राहोत,
तो पृथ्वीवरून त्यांचें स्मरण नाहींसें करो.
१६ कारण त्या मनुष्याला दया करण्याचें भान राहिलें नाहीं,
तर दीन, दरिद्री व घाबरलेल्या माणसांचा वध करण्यासाठीं
तो त्यांच्या पाठीस लागला.
१७ शाप देण्याची त्याला आवड असे
म्हणून तो शाप त्यालाच लागला;
आशीर्वाद देण्याची त्याला आवड नसे,
म्हणून तो आशीर्वादाला मुकला.
१८ शाप देणें हा त्याचा पेहराव बनला होता,
तें त्याच्या पोटांत पाण्यासारखें
व त्याच्या हाडांत तेलासारखें भिनून गेलें.
१९ तें त्याला पांघरावयाच्या वस्त्राप्रमाणें होवो,
नेहमीं वापरावयाच्या कंबरपट्टयाप्रमाणें तें त्याला जखडून राहो.
२० माझ्या विरोध्यांस, मजविरुद्ध वाईट बोलणाऱ्यांस परमेश्वराकडून हेंच प्रतिफळ मिळो.
२१ हे परमेश्वरा, हे प्रभू, तूं आपल्या नामाकरितां मला वागवून घे;
तुझी दया उत्तम आहे म्हणून तूं मला सोडीव.
२२ कारण मी दीन व दरिद्री आहें;
आणि माझें हृदय विव्हळ झालें आहे.
२३ उतरत्या सावलीप्रमाणें मी चाललों आहें;
मी टोळाप्रमाणें उडविला जात आहें.
२४ उपासानें माझे गुडघे लटपटत आहेत;
माझें शरीर रोड होऊन मला शक्ति राहिली नाहीं.
२५ मी लोकांस निंदेचा विषय झालों आहें;
मला पाहून ते माना हालवितात.
२६ हे परमेश्वरा, माझ्या देवा, माझें साहाय्य कर;
तूं आपल्या दयेस अनुसरून मला तार.
२७ हे परमेश्वरा, ह्यांत तुझा हात आहे,
हें तूंच केलें आहे असें ते जाणोत.
२८ ते शाप देतात पण तूं आशीर्वाद देतोस;
ते उठतील तेव्हां लज्जित होतील,
परंतु तुझा सेवक हर्षित होईल.
२९ माझे विरोधी अपमानानें व्याप्त होतील,
झग्याप्रमाणें ते लज्जा पांघरितील.
३० मी आपल्या मुखानें परमेश्वराचें बहुत उपकारस्मरण करीन,
लोकसमाजांत त्याला स्तवीन.
३१ कारण दरिद्र्याचा जीव दोषी ठरविणारे जे आहेत त्यांपासून त्याचा बचाव करावयासाठीं,
तो त्याच्या उजव्या हाताकडे उभा असतो.

## ११० [ दाविदाचें स्तोत्र ]

१ माझ्या प्रभूला परमेश्वर म्हणतो,
मी तुझे वैरी तुझें पादासन करीपर्यंत तूं माझ्या

उजवीकडे बैस.
२ परमेश्वर तुझें बलवेत्र सीयोनांतून पुढें नेऊन म्हणतो,
तूं आपल्या शत्रूंवर प्रभुत्व कर.
३ तुझ्या पराक्रमाच्या दिवशीं तुझे लोक संतोषानें
पुढें होतात,
पावित्र्यानें मंडित झालेले तुझे तरुण पहाटेच्या
दहिंवरासारखे तुला येऊन मिळतात.
४ परमेश्वरानें शपथ वाहिली आहे आणि ती तो
बदलणार नाहीं;
ती अशी कीं मलकीसदेकाच्या संप्रदायाप्रमाणें
तूं युगानुयुग याजक आहेस.
५ तुझ्या उजव्या हाताकडे असलेला प्रभु
आपल्या क्रोधाच्या दिवशीं राजास मारीत आहे.
६ तो राष्ट्रांत न्यायाधिशी करील;
रणभूमि प्रेतांनीं भरील;
चोहोंकडे मस्तकें फोडील.
७ मार्गानें चालत असतां तो ओहोळांतलें पाणी
पिईल;
आणि आपलें डोकें वर करील.

# १११

१ परमेश्वराचें[1] स्तवन करा.
सरळ जनांच्या सभेंत व मंडळींत
मी अगदीं मनःपूर्वक परमेश्वराचें
उपकारस्मरण करीन.
२ परमेश्वराचीं कृत्यें थोर आहेत,
ज्यांस तीं आवडतात ते सर्व त्यांचा
शोध करितात.
३ त्याची करणी साक्षात् प्रताप व महिमा आहे.
त्याचें न्याय्यत्व सर्वकाळ टिकून राहतें.
४ आपल्या अद्भुत कृत्यांचें स्मरण राहावें असें त्यानें
केलें आहे;
परमेश्वर कृपाळू व कनवाळू आहे.
५ त्यानें आपलें भय धरणाऱ्यांस अन्न दिलें आहे;
तो आपला करार सदा स्मरतो.
६ त्यानें आपल्या लोकांस राष्ट्रें वतनादाखल देऊन
आपल्या कृत्यांचें सामर्थ्य दाखविलें आहे.
७ त्याच्या हातचीं कृत्यें साक्षात् सत्य व न्याय आहेत;
त्याचे सर्व विधि विश्वसनीय आहेत.
८ ते सदासर्वकाळ अढळ असे आहेत.
ते सत्यानें व सरळपणानें नेमिलेले आहेत.
९ त्यानें आपल्या लोकांस उद्धारदान पाठवून
दिलें आहे;
त्यानें आपला करार सर्वकाळचा नेमिला आहे.
त्याचें नाम पवित्र व भययोग्य आहे.
१० परमेश्वराचें भय ज्ञानाचा उगम होय.
त्याप्रमाणें जे वर्ततात त्या सर्वांस सुबुद्धि प्राप्त होते.
त्याचें स्तवन सर्वकाल चालतें.

# ११२

१ परमेश्वराचें[1] स्तवन करा.
जो मनुष्य परमेश्वराचें भय धरितो
आणि ज्याचा हर्ष त्याच्या आज्ञांमध्यें आहे
तो धन्य !
२ त्याची संतति पृथ्वीवर पराक्रमी होईल;
सात्त्विकांचा वंश आशीर्वादयुक्त होईल.
३ धनसंपदा त्याच्या घरीं असते;
त्याचें नीतिमत्त्व सर्वकाळ राहतें.
४ सात्त्विक जनांस अंधकारांत सूर्यप्रकाश प्राप्त होतो;
त्याच्या ठायीं कृपा, दया व न्याय
हीं ओतप्रोत आहेत.
५ जो मनुष्य दया करितो व उसनें देतो त्याचें
कल्याण होतें;
तो न्यायसभेंत आपल्या वादाचें समर्थन करील.
६ तो कधींहि ढळणार नाहीं;
धार्मिकाचें स्मरण सर्वकाळ राहतें.
७ तो वाईट बातमीला भिणार नाहीं;
त्याचें मन परमेश्वरावर भाव ठेवून अढळ राहतें.
८ त्याचें मन स्थिर असतें,
आपल्या शत्रूंची गति आपल्या इच्छेप्रमाणें

१ मुळांत : हालेलूया.

१ मुळांत : हालेलूया.

झालेली पाहीपर्यंत तो डगमगणार नाहीं.
९ त्यानें सढळ हातानें गरिबांस दानधर्म
केला आहे;
त्याची धार्मिकता सर्वकाळ राहील;
त्याचें शिंग गौरवयुक्त होऊन उन्नत होतें.
१० हें पाहून दुर्जन खिन्न होतील;
ते दांतओठ चावतील पण विरघळून जातील;
दुर्जनांची इच्छा नष्ट होईल.

## ११३

१ परमेश्वराचें[1] स्तवन करा.
परमेश्वराच्या सेवकांनो,
स्तवन करा;
परमेश्वराच्या नामाचें स्तवन करा.
२ आतांपासून सर्वकाळ
परमेश्वराच्या नामाचा धन्यवाद होवो.
३ सूर्याच्या उगवतीपासून मावळतीपर्यंत
परमेश्वराचें नाम स्तवनीय आहे.
४ परमेश्वर सर्व राष्ट्रांहून उन्नत आहे;
त्याचें वैभव आकाशाहून उंच आहे.
५ परमेश्वर आमचा देव याच्यासारखा कोण आहे ?
तो उच्च स्थळीं सिंहासनारूढ आहे.
६ तो आकाश व पृथ्वी यांचें अवलोकन करण्यास
लवतो.
७ तो दीनांस धुळींतून उठवितो,
दरिद्र्यांस उकिरड्यावरून उचलितो;
८ आणि त्यांस अधिपतींच्या,
आपल्या लोकांच्या अधिपतींच्या, पंक्तीस बसवितो.
९ तो वांझ स्त्रियेला गृहिणी करून
मुलांची आनंदी माता करितो.
परमेश्वराचें स्तवन करा.

## ११४

१ इस्राएल मिसर देशांतून निघाला,
याकोबाचें घराणें परकी भाषा बोल-
णाऱ्या लोकांतून निघालें,
२ तेव्हां यहूदा त्याचें पवित्रस्थान झाला,

[1] मुळांत : हालेलूया.

इस्राएल त्याचें राष्ट्र झाला.
३ हें पाहून समुद्र पळाला;
यार्देन मागें हटली.
४ पर्वतांनीं मेंढ्यांसारख्या,
टेकड्यांनीं कोकरांसारख्या उड्या मारिल्या.
५ हे समुद्रा, तुला काय झालें म्हणून तूं पळतोस ?
हे यार्देने, तुला काय झालें म्हणून तूं मागें हटतेस ?
६ अहो पर्वतांनो, तुम्हांला काय झालें म्हणून तुम्ही
मेंढ्यांसारख्या उड्या मारितां ?
अहो टेकड्यांनो, तुम्हांला काय झालें म्हणून तुम्ही
कोकरांसारख्या उड्या मारितां ?
७ अगे पृथ्वी, तूं प्रभूसमोर,
याकोबाच्या देवासमोर, थरथरां कांप.
८ तो खडक पालटून पाण्याचें तळें करितो,
गारेचा खडक पालटून पाण्याचा झरा करितो.

## ११५

१ हे परमेश्वरा, आमचें नको, आमचें नको,
तर आपल्या नामाचेंच गौरव कर,
कारण तूं दयाळू व सत्य आहेस.
२ यांचा देव कोठें आहे ?
असें राष्ट्रांनीं कां म्हणावें ?
३ आमचा देव स्वर्गांत आहे;
त्याला बरें वाटतें तें सर्व तो करितो.
४ त्यांच्या मूर्ति केवळ सोनेंरुपें आहेत;
त्या मनुष्यांच्या हातच्या कृति आहेत.
५ त्यांस तोंड आहे पण बोलतां येत नाहीं;
त्यांस डोळे आहेत पण दिसत नाहीं;
६ त्यांस कान आहेत पण ऐकूं येत नाहीं;
त्यांस नाक आहे पण वास येत नाहीं;
७ त्यांस हात आहेत पण स्पर्श करतां येत नाहीं;
पाय आहेत पण चालतां येत नाहीं;
त्यांच्या कंठांतून शब्द निघत नाहीं.
८ त्या बनविणारे व त्यांवर भाव ठेवणारे सर्व
त्यांसारखे बनतात.
९ हे इस्राएला, परमेश्वरावर भाव ठेव;
तोच त्यांचा साहाय्यकर्ता व त्यांची ढाल आहे.

१० हे अहरोनाच्या घराण्या, परमेश्वरावर भाव ठेव;
तोच त्यांचा साहाय्यकर्ता व त्यांची ढाल आहे.
११ अहो परमेश्वराचें भय धरणाऱ्यांनो, परमेश्वरावर
भाव ठेवा,
तोच त्यांचा साहाय्यकर्ता व त्यांची ढाल आहे.
१२ परमेश्वरानें आमची आठवण केली आहे; तो
आशीर्वाद देईल,
इस्राएलाच्या घराण्याला आशीर्वाद देईल,
अहरोनाच्या घराण्याला आशीर्वाद देईल.
१३ परमेश्वराचें भय धरणाऱ्या लहानथोरांस
तो आशीर्वाद देईल,
१४ परमेश्वर तुमची वाढ करील,
तुमची व तुमच्या मुलांची वाढ करील.
१५ आकाश व पृथ्वी हीं निर्माण करणाऱ्या परमेश्वराचा
तुम्हांस आशीर्वाद असो.
१६ स्वर्ग तर परमेश्वराचा आहे;
पण पृथ्वी त्यानें मानवजातीला दिली आहे.
१७ मेलेले, निःशब्दस्थानीं उतरलेले, कोणीहि
परमेश्वराचें स्तवन करीत नाहींत;
१८ पण आम्ही आतांपासून सर्वकाळ परमेशाचा धन्य-
वाद करीत राहूं.
परमेश्वराचें[1] स्तवन करा.

# ११६

१ मी परमेश्वरावर प्रेम करितों
कारण तो माझी विनवणी ऐकतो.
२ त्यानें आपला कान मजकडे
लाविला आहे,
म्हणून मी जन्मभर त्याचा धावा करीन.
३ मृत्यूच्या बंधनांनीं मला वेष्टिलें,
अधोलोकच्या यातना मला झाल्या,
पेच व क्लेश हीं मला प्राप्त झालीं.
४ तेव्हां मी परमेश्वराच्या नामाचा धावा
करून म्हणालों,
हे परमेश्वरा, तुला मी विनवितों कीं माझा जीव
मुक्त कर..
५ परमेश्वर कृपाळू व न्यायी आहे;
आमचा देव कन्हवाळू आहे.
६ परमेश्वर भोळ्याचें रक्षण करितो;
मी दीनावस्थेंत होतों तेव्हां त्यानें माझा उद्धार केला.
७ हे माझ्या जिवा, तूं आपल्या विश्रामस्थानीं परत ये,
कारण परमेश्वरानें तुजवर बहुत उपकार
केले आहेत.
८ तूं माझा जीव मरणापासून,
माझे डोळे अश्रूंपासून,
माझे पाय ठेचाळण्यापासून रक्षिले आहेत.
९ जीवंतांच्या भूमीवर मी परमेश्वरासमोर चालेन.
१० मी फार पीडित आहें, असें मी म्हणतों;
तरी देवावर माझी श्रद्धा आहे.
११ मी अधीरपणें म्हणालों कीं
सर्व मनुष्यें लबाड आहेत.
१२ परमेश्वरानें मजवर केलेल्या उपकारांचा
मी कसा उतराई होऊं ?
१३ मी तारणाचा प्याला हातीं घेऊन
परमेश्वराच्या नामाचा धावा करीन.
१४ परमेश्वराला केलेले नवस
मी त्याच्या सर्व लोकांसमक्ष फेडीन.
१५ परमेश्वराच्या दृष्टीनें
त्याच्या भक्तांचें मरण अमोल आहे.
१६ हे परमेश्वरा, मी खरोखर तुझा दास आहें;
मी तुझा दास; तुझ्या दासीचा पुत्र आहें;
तूं माझीं बंधनें सोडिलीं आहेत.
१७ मी तुला उपकारस्मरणरूप होमबलि अर्पीन,
परमेश्वराच्या नामाची घोषणा करीन.
१८ मीं परमेश्वराला केलेले नवस
त्याच्या सर्व लोकांसमक्ष फेडीन,
१९ परमेश्वराच्या मंदिराच्या अंगणांत,
हे यरुशलेमा, तुझ्यामध्यें ते फेडीन.
परमेश्वराचें[1] स्तवन करा.

१ मुळांत : हालेलूया.

१ मुळांत : हालेलूया.

११७

१ अहो सर्व राष्ट्रांनो, परमेश्वराचें स्तवन करा;
अहो सर्व लोकांनो, त्याचें स्तवन करा.
२ कारण त्याची दया आम्हांवर विपुल
झाली आहे
आणि परमेश्वराचें सत्य सनातन आहे.
परमेश्वराचें स्तवन करा.

११८

१ परमेश्वराचें उपकारस्मरण करा, तो
चांगला आहे;
त्याची दया सनातन आहे.
२ आतां इस्राएलानें म्हणावें कीं
त्याची दया सनातन आहे.
३ अहरोनाच्या घराण्यानें म्हणावें कीं
त्याची दया सनातन आहे.
४ परमेश्वराचें भय धरणाऱ्यांनीं म्हणावें कीं
त्याची दया सनातन आहे.
५ अडचणीच्या स्थलांतून मीं परमेश्वराचा धावा केला;
तो ऐकून परमेश्वरानें मला प्रशस्त स्थलीं नेलें.
६ परमेश्वर माझ्या पक्षाचा आहे; मी भिणार नाहीं;
मनुष्य माझें काय करणार?
७ माझा साहाय्यकर्ता परमेश्वर माझ्या पक्षाचा आहे;
माझ्या द्वेष करणाऱ्यांची दशा
मी डोळे भरून पाहीन.
८ मनुष्यावर भरवसा ठेवण्यापेक्षां
परमेश्वराला शरण जावें हें बरें.
९ अधिपतींवर भरवसा ठेवण्यापेक्षां
[1]परमेश्वराला शरण जावें हें बरें.
१० सर्व राष्ट्रांनीं मला घेरिलें आहे;
परमेश्वराच्या नामानें मी त्यांचा उच्छेद करीन.
११ त्यांनीं मला घेरिलें आहे; अहो, मला घेरिलें आहे;
परमेश्वराचें नाम घेऊन मी त्यांचा उच्छेद करीन.
१२ त्यांनीं मला मधमाशांप्रमाणें घेरिलें आहे;
कांटवणाच्या आगीप्रमाणें ते विझून जातील,
परमेश्वराच्या नामानें मी त्यांचा उच्छेद करीन.

१ मुळांत : हालेलूया.

१३ मीं पडावें म्हणून तूं मला जोरानें धक्का दिला,
पण परमेश्वरानें मला सावरिलें.
१४ परमेश माझें बल, व माझा स्तोत्रविषय आहे;
तो माझा उद्धारक झाला आहे.
१५ उत्सवाचा व तारणाचा शब्द
धार्मिकांच्या वस्तींत आहे;
परमेश्वराचा उजवा हात पराक्रम करितो.
१६ परमेश्वराचा उजवा हात उभारिलेला आहे;
परमेश्वराचा उजवा हात पराक्रम करितो.
१७ मी मरावयाचा नाहीं, मी जगणार;
आणि परमेश्वराच्या कृत्यांचें वर्णन करणार.
१८ परमेश्वरानें मला जबर शासन केलें;
तरी मला मृत्यूच्या हवालीं केलें नाहीं.
१९ मजसाठीं धार्मिकतेचीं द्वारें उघडा;
मी त्यांतून प्रवेश करून परमेश्वराचें उपकारस्मरण
करीन.
२० हें परमेश्वराचें द्वार आहे;
यांतून धार्मिक जन प्रवेश करोत.
२१ तूं माझें ऐकलें आहे,
तूं माझा तारक झाला आहेस,
यास्तव मी तुझें उपकारस्मरण करितों.
२२ बांधणाऱ्यांनीं नापसंत केलेला दगड
कोनशिला झाला आहे.
२३ हें परमेश्वराच्या हातून घडलें आहे;
हें आमच्या दृष्टीनें अद्भुत कृत्य आहे.
२४ परमेश्वरानें हा दिवस नेमिला आहे;
यांत आपण उल्लास व आनंद करूं.
२५ हे परमेश्वरा, तुला विनवितों कीं आमचा उद्धार कर.
हे परमेश्वरा, तुला विनवितों कीं आम्हांस संपदा दे.
२६ परमेश्वराच्या नामानें येणाऱ्याचा धन्यवाद होवो
परमेश्वराच्या मंदिरांतून आम्ही तुम्हांस आशीर्वाद
देतों.
२७ प्रकाश दिला आहे, त्यानें आम्हांस प्रकाश दिला
आहे;
उत्सवाचा यज्ञपशु वेदीच्या शिंगांस
दोऱ्यांनीं बांधा.

२८ तूं माझा देव आहेस;
मी तुझें उपकारस्मरण करीन;
हे माझ्या देवा, मी तुझी थोरवी गाईन.
२९ परमेश्वराचें उपकारस्मरण करा; तो चांगला आहे;
त्याची दया सनातन आहे.

# ११९

१ धन्य ते जन, जे आपलें वर्तन चोख ठेवून
परमेश्वराच्या शास्त्राप्रमाणें चालतात.
२ धन्य ते जन, जे त्याचे निर्बंध पाळून
त्याला मनःपूर्वक शरण जातात.
३ ते कांहीं अधर्माचरण करीत नाहींत;
तर त्याच्या मार्गानें चालतात.
४ तुझे विधि आम्हीं मनःपूर्वक पाळावे
म्हणून तूं ते आम्हांस लावून दिले आहेत.
५ तुझे नियम पाळावयासाठीं माझी चालचलणूक व्यवस्थित असावी,
हेंच माझें मागणें आहे.
६ मीं तुझ्या सर्व आज्ञांकडे लक्ष पुरविलें
तर मी फजीत होणार नाहीं.
७ तुझ्या रास्त निर्णयांचें ज्ञान मी प्राप्त करून घेईन
तेव्हां मी सरळ मनानें तुझें स्तवन करीन.
८ मी तुझे नियम पाळीन;
माझा सर्वस्वीं त्याग करूं नको.

९ तरुण आपला वर्तनक्रम कशानें शुद्ध राखील?
तुझ्या वचनाप्रमाणें सावधान राहण्यानें.
१० सर्व मनानें तुला मी शरण आलों आहें;
तुझ्या आज्ञांपासून मला बहकूं देऊं नको.
११ मीं तुझ्याविरुद्ध पाप करूं नये
म्हणून मीं आपल्या मनांत तुझें वचन जपून ठेविलें आहे.
१२ हे परमेश्वरा, तूं धन्य आहेस;
तुझे नियम मला शिकीव.
१३ मी आपल्या मुखानें
तुझ्या तोंडच्या सर्व निर्णयांचें निवेदन करितों.
१४ तुझ्या निर्बंधांचा मार्ग हीच माझी धनसंपदा,
असें मानून मी अत्यानंद करितों.
१५ मी तुझ्या विधींचें मनन करीन,
तुझ्या मार्गांकडे लक्ष देईन.
१६ मी तुझ्या नियमांनीं सुख पावेन;
मी तुझें वचन विसरावयाचा नाहीं.

१७ आपल्या दासाला औदार्य दाखीव,
म्हणजे मी जिवंत राहून तुझें वचन पाळीन.
१८ तूं माझे नेत्र उघड,
म्हणजे तुझ्या शास्त्रांतील अद्भुत गोष्टी माझ्या दृष्टीस पडतील.
१९ मी या जगांत केवळ प्रवासी आहें;
तुझ्या आज्ञा मजपासून गुप्त ठेवूं नको.
२० तुझ्या निर्णयांची सर्वदा उत्कंठा धरून
माझा जीव कासावीस झाला आहे.
२१ गर्विष्ठांस तूं धमकावितोस,
तुझ्या आज्ञांपासून बहकणारे शापित आहेत.
२२ निंदा व तिरस्कार मजपासून दूर कर;
कारण मी तुझे निर्बंध पाळितों.
२३ अधिपतिहि बसून आपसांत मजविरुद्ध बोलतात;
पण तुझा दास तुझ्या नियमांचें मनन करितो.
२४ तुझे निर्बंध मला फार गोड आहेत.
ते माझे मंत्री आहेत.

२५ माझा जीव धुळीस मिळाला आहे;
तूं आपल्या वचनाप्रमाणें मला नवजीवन दे.
२६ मीं आपला वर्तनक्रम तुजपुढें मांडिला आणि तूं माझें ऐकलें;
तूं आपले नियम मला शिकीव.
२७ तुझ्या विधींची पद्धति मला समजावून दे,
म्हणजे मी तुझ्या अद्भुत कृत्यांचें मनन करीन.
२८ माझा जीव खेदानें गळून जातो;
आपल्या वचनाप्रमाणें मला आधार दे.

२९ असत्याचा मार्ग मजपासून दूर कर;
कृपाळू होऊन तुझें शास्त्र मला दे.
३० मीं सत्याचा मार्ग निवडिला आहे;
मीं तुझे निर्णय आपल्यासमोर ठेविले आहेत.
३१ मी तुझे निर्बंध धरून राहिलों आहें;
हे परमेश्वरा, मला फजीत होऊं देऊं नको.
३२ तूं माझें मन विकसित करतोस,
म्हणून मी तुझ्या आज्ञांच्या मार्गानें धावतों.

३३ हे परमेश्वरा, तूं आपल्या नियमांचा मार्ग मला दाखीव,
म्हणजे तो मी शेवटपर्यंत धरून राहीन.
३४ मला बुद्धि दे, म्हणजे मी तुझें शास्त्र पाळीन;
खरोखर पूर्ण मनोभावें तें मी पाळीन.
३५ तूं आपल्या आज्ञांच्या मार्गानें मला चालीव;
त्यांतच माझा सुखानंद आहे.
३६ माझ्या मनाचा कल लाभाकडे नको, तर तुझ्या निर्बंधांकडे होऊं दे.
३७ निरर्थक गोष्टींपासून माझी दृष्टि फिरीव;
तुझ्या मार्गात मला उत्तेजित कर.
३८ तूं आपलें भय धरणाऱ्यास दिलेलें वचन
आपल्या दासासंबंधानें खरें कर.
३९ मला निंदेचें भय आहे म्हणून ती दूर कर;
तुझे निर्णय उत्तम आहेत.
४० पाहा, मला तुझ्या विधींचा ध्यास लागून राहिला आहे;
तूं आपल्या न्याय्यत्वानें मला उत्तेजित कर.

४१ हे परमेश्वरा, तुझी प्रेमयुक्त दया मला प्राप्त होवो.
तुझ्या वचनानुसार तूं सिद्ध केलेलें तारण मला प्राप्त होवो;
४२ म्हणजे माझी निंदा करणाऱ्यास
मला उत्तर देतां येईल;
कारण तुझ्या वचनावर माझा भरवसा आहे.
४३ तूं आपलें सत्यवचन माझ्या मुखांतून सर्वथा नाहींसें होऊं देऊं नको,
कारण मीं तुझ्या निर्णयांची आशा धरिली आहे.
४४ तेणेंकरून मी तुझें शास्त्र नित्यनेमानें
सदासर्वकाळ पाळीत राहीन.
४५ मी मोकळेपणानें चालेन,
कारण मीं तुझ्या विधींचा आश्रय केला आहे.
४६ मी राजांसमोरसुद्धां तुझे निर्बंध सांगेन,
संकोच धरणार नाहीं.
४७ मी तुझ्या आज्ञांमध्यें पूर्णानंद मानीन,
त्या मला प्रिय आहेत.
४८ तुझ्या आज्ञा मला प्रिय आहेत म्हणून मी आपले हात उभारीन
आणि तुझ्या नियमांचें मनन करीन.

४९ तूं आपल्या दासाला दिलेलें वचन आठीव,
कारण तूं मला आशा लाविली आहे.
५० तुझें वचन मला उत्तेजित करितें;
हेंच माझ्या दुःखांत माझें सांत्वन आहे.
५१ गर्विष्ठांनीं माझा फार उपहास केला,
तरी मी तुझ्या शास्त्रापासून बहकलों नाहीं.
५२ हे परमेश्वरा, तुझे पुरातन निर्णय आठवून
मी समाधान पावलों आहें.
५३ दुर्जन तुझ्या शास्त्राचा धिक्कार करितात,
म्हणून मला फार संताप येतो.
५४ माझ्या संसारयात्रेंत
तुझे नियम मला गीतरूप झाले आहेत.
५५ हे परमेश्वरा, मीं रात्रीं तुझ्या नामाचें स्मरण करून
तुझें शास्त्र पाळिलें आहे.
५६ मी तुझे विधि आचरितों
त्यांपासूनच माझें हित झालें.

५७ परमेश्वर माझा वतनभाग आहे;
तुझीं वचनें पाळण्याचा मीं निश्चय केला आहे.
५८ मीं अगदीं मनापासून तुझा प्रसाद याचिला आहे
आपल्या वचनाप्रमाणें मजवर कृपा कर.
५९ आपल्या वर्तनक्रमाविषयीं विचार करून मीं

तुझ्या निर्बंधांकडे पावलें फिरविलीं.
६० मी तुझ्या आज्ञा पाळण्याविषयीं उतावळा झालों,
मीं विलंब लाविला नाहीं.
६१ दुर्जनांच्या पाशांनीं मला वेष्टिलें,
तरी मी तुझें शास्त्र विसरलों नाहीं.
६२ तुझ्या रास्त निर्णयांबद्दल
तुझें उपकारस्मरण करावयास
मी मध्यरात्रीं उठतों.
६३ तुझें भय धरणाऱ्या सर्वांचा,
तुझे विधि पाळणाऱ्यांचा, मी सोबती आहें.
६४ हे परमेश्वरा, तुझ्या दयेनें पृथ्वी भरली आहे;
तूं आपले नियम मला शिकीव.

६५ हे परमेश्वरा, तूं आपल्या वचनाप्रमाणें
आपल्या दासाचें हित केलें आहे.
६६ सद्विवेक व ज्ञान मला दे,
कारण तुझ्या आज्ञांवर माझी निष्ठा आहे.
६७ मी पीडित झाल्यापूर्वी भटकत असें,
पण आतां मी तुझें वचन पाळीत आहें.
६८ तूं चांगला आहेस, तूं चांगलें करितोस.
तुझे नियम मला शिकीव.
६९ गर्विष्ठांनीं मजवर खोटा आरोप आणिला आहे;
तथापि मी अगदीं मनापासून तुझे विधि पाळीन.
७० त्यांचें मन कठीण झालें आहे;
मी तर तुझ्या शास्त्रांत रमून गेलों आहें.
७१ मी पीडित झाल्यामुळें माझें बरें झालें;
कारण तेणेंकरून मी तुझे नियम शिकलों.
७२ सोन्यारुप्याच्या लक्षावधि नाण्यांपेक्षां
तुझ्या मुखींचें शास्त्र मला मोलवान् आहे.

७३ तुझ्या हातांनीं मला निर्माण केलें व घडिलें;
तुझ्या आज्ञा शिकण्यास मला बुद्धि दे.
७४ तुझें भय धरणारे मला पाहून हर्ष पावोत;
कारण मीं तुझ्या वचनाची आशा धरिली आहे.
७५ हे परमेश्वरा, तुझे निर्णय न्यायानुसार आहेत,
आणि सत्यास अनुसरून तूं मला पीडिलें आहे
हें मी जाणतों.
७६ तूं आपल्या सेवकाला दिलेल्या वचनानुसार
तुझ्या प्रेमयुक्त दयेनें मला सांत्वन प्राप्त होऊं दे.
७७ मजवर करुणा कर म्हणजे मी जगेन;
कारण तुझें शास्त्र माझा पूर्णानंद आहे.
७८ गर्विष्ठ फजीत होवोत, कारण त्यांनीं लबाडीनें
माझा अन्याय केला आहे;
मी तुझ्या विधींचें मनन करीन.
७९ तुझें भय धरणारे माझ्याकडे पाहोत,
म्हणजे त्यांस तुझे निर्बंध कळतील.
८० मीं लज्जित होऊं नये
म्हणून माझें चित्त तुझ्या नियमांकडे एकनिष्ठपणें
लागूं दे.

८१ तूं सिद्ध केलेल्या तारणाची उत्कंठा धरून माझा जीव
व्याकुळ झाला आहे;
मी तुझ्या वचनाची आशा धरितों.
८२ तुझ्या वचनाचा ध्यास लागून
माझे डोळे शिणले आहेत;
तूं माझें सांत्वन केव्हां करिशील ?
असें मी म्हणत आहें.
८३ धुरांत ठेविलेल्या बुधलीसारखा मी झालों आहें;
तरी मी तुझे नियम विसरलों नाहीं.
८४ तुझ्या सेवकाचे दिवस कितीसे उरले आहेत ?
माझ्या पाठीस लागणाऱ्यांस
तूं कधीं न्यायदंड करिशील ?
८५ गर्विष्ठ तुझ्या शास्त्राप्रमाणें चालत नाहींत;
त्यांनीं मजसाठीं खाचा खणून ठेविल्या आहेत.
८६ तुझ्या सर्व आज्ञा सत्य आहेत;
ते लबाडीनें माझ्या पाठीस लागले आहेत, तूं
मला साहाय्य कर.
८७ त्यांनीं पृथ्वीवरून माझा बहुतेक नायनाट केला;
तरी मीं तुझे विधि सोडिले नाहींत.
८८ तूं आपल्या सप्रेम दयेनें मला नवजीवन दे,

म्हणजे मी तुझ्या मुखींचे निर्बंध पाळीन.

८९ हे परमेश्वरा, तुझें वचन स्वर्गांत सर्वकाळ स्थिर
आहे.
९० तुझी सत्यता पिढ्यानपिढ्या आहे;
तूं पृथ्वी स्थापिली व तीं तशीच कायम आहे.
९१ तीं तुझ्या निर्णयांप्रमाणें आजपर्यंत
कायम राहिलीं आहेत;
कारण सर्व कांहीं तुझी सेवा करीत आहेत.
९२ तुझ्या शास्त्राच्या ठायीं मला आनंद वाटला नसता
तर माझ्या दुःखांत माझा अंत कधींच झाला
असता.
९३ तुझे विधि मी कधींहि विसरणार नाहीं;
कारण तूं त्यांच्या योगें मला नवजीवन दिलें आहे.
९४ मी तुझा आहें, माझें तारण कर;
कारण मीं तुझ्या विधींचा आश्रय केला आहे.
९५ दुर्जन माझा नाश करावयास टपले आहेत;
तरी मी तुझे निर्बंध ध्यानांत धरीन.
९६ सर्व पूर्णतेला मर्यादा आहे हें मीं पाहिलें आहे;
तुझी आज्ञा अत्यंत व्यापक आहे;

९७ अहाहा, तुझें शास्त्र मला किती प्रिय आहे!
दिवसभर त्याकडे माझें लक्ष लागलेलें असतें.
तुझ्या आज्ञा मला आपल्या वैऱ्यांच्यापेक्षां
शहाणें करितात;
कारण त्या सदोदित माझ्याजवळच आहेत.
९९ माझ्या सर्व शिक्षकांपेक्षां मला अधिक समज
आहे;
कारण मी तुझ्या निर्बंधांचें मनन करितों.
१०० वयोवृद्धांपेक्षां मला अधिक कळतें;
कारण मी तुझे विधि पाळितों.
१०१ तुझें वचन पाळावें म्हणून
मी आपलें पाऊल हरएक कुमार्गापासून आवरितों.
१०२ तुझ्या निर्णयांपासून मी ढळलों नाहीं;
कारण तूं मला शिकविलें आहे.
१०३ तुझीं वचनें माझ्या जिव्हेला किती मधुर
लागतात!
माझ्या तोंडाला तीं मधापेक्षां गोड लागतात.
१०४ तुझ्या विधींच्या द्वारें मला समज प्राप्त होतो,
म्हणून मी प्रत्येक असत्यमार्गाचा द्वेष करितों.

१०५ तुझें वचन माझ्या पावलांकरितां दिवा
व माझ्या मार्गावर प्रकाश आहे.
१०६ तुझे रास्त निर्णय पाळीन अशी शपथ मीं
वाहिली आहे,
ती मी खरी करीन.
१०७ मी फार पीडलों आहें;
हे परमेश्वरा, तूं आपल्या वचनाप्रमाणें मला
नवजीवन दे.
१०८ हे परमेश्वरा, माझ्या तोंडचीं वचनें हीं
स्वसंतोषाचीं अर्पणें समजून मान्य कर;
तुझे निर्णय मला शिकीव.
१०९ मी आपला जीव नेहमीं मुठींत धरून आहें,
तरी मी तुझें शास्त्र विसरलों नाहीं.
११० दुर्जनांनीं माझ्यासाठीं पाश मांडिला आहे,
तरी तुझ्या विधींपासून मी बहकलों नाहीं.
१११ तुझे निर्बंध माझें सर्वकाळचें वतन म्हणून मीं
स्वीकारिले आहेत;
कारण त्यांच्या योगें माझ्या मनाला हर्ष होतो.
११२ तुझे नियम सर्वदा शेवटपर्यंत पाळण्याकडे
मीं आपलें मन लाविलें आहे.

११३ मी दुटप्पी मनुष्यांचा द्वेष करितों,
तथापि तुझें शास्त्र मला प्रिय आहे.
११४ तूं माझा आश्रय व माझी ढाल आहेस;
मी तुझ्या वचनाची आशा धरितों.
११५ अहो दुष्कर्म्यांनो, मजपासून दूर व्हा;
मी आपल्या देवाच्या आज्ञा पाळणार.
११६ तूं आपल्या वचनानुसार मला संभाळ; म्हणजे
मी जगेन;

माझ्या आशेसंबंधानें मला फजीत होऊं
देऊं नको.
११७ मला आधार दे म्हणजे मी सुरक्षित राहीन,
आणि तुझ्या नियमांवर निरंतर चित्त ठेवीन.
११८ तुझ्या नियमांपासून बहकणाऱ्या सर्वांचा
तूं धिक्कार करितोस;
त्यांचें कपट निरर्थक आहे.
११९ पृथ्वीवरील सर्व दुर्जनांस तूं गळाप्रमाणें
दूर करितोस;
यामुळें तुझे निर्बंध मला प्रिय आहेत.
१२० तुझ्या भयानें माझ्या अंगावर कांटा उभा राहतो;
तुझ्या निर्णयांस मी भितों.

१२१ मीं न्याय व नीति आचरिली आहे;
माझ्या छळणाऱ्यांच्या हातीं
मला सोडून देऊं नको.
१२२ तूं आपल्या दासाच्या हितासाठीं जामीन हो;
गर्विष्ठांस माझा छळ करूं देऊं नको.
१२३ तूं सिद्ध केलेल्या तारणाची व तुझ्या न्याय्य
वचनाची प्रतीक्षा करितां करितां
माझे डोळे शिणले आहेत.
१२४ तूं आपल्या दासाला आपल्या दयेस अनुसरून
वागवून घे,
आणि तूं आपले नियम मला शिकीव.
१२५ मी तुझा दास आहें,
मला तुझ्या निर्बंधांचें ज्ञान व्हावें म्हणून मला
बुद्धि दे.
१२६ परमेश्वरानें आपला हस्तपराक्रम दाखविण्याचा
समय आला आहे;
कारण त्यांनीं तुझ्या शास्त्राचें अतिक्रमण
केलें आहे;
१२७ म्हणूनच मी तुझ्या आज्ञा सोन्यापेक्षां,
बावनकशी सोन्यापेक्षां प्रिय मानितों.
१२८ यामुळें सर्व बाबींसंबंधानें तुझे सर्व विधि
यथायोग्य आहेत असें मी मानितों;
आणि प्रत्येक असत्य मार्गाचा मी द्वेष करितों.

१२९ तुझे निर्बंध आश्चर्यकारक आहेत;
म्हणून माझा जीव ते पाळितो.
१३० तुझ्या वचनांच्या उलगड्यानें प्रकाश प्राप्त होतो,
त्यानें भोळ्यांस ज्ञान प्राप्त होतें.
१३१ मीं तोंड उघडून धापा टाकल्या;
कारण मला तुझ्या आज्ञांचा ध्यास लागला.
१३२ मजकडे वळ आणि तुझ्या नामाची आवड
धरणाऱ्यांस योग्य
अशी कृपा मजवर कर.
१३३ तुझ्या वचनाच्या द्वारें माझीं पावलें स्थिर कर.
आणि कसल्याहि दुष्टाईचा मजवर अंमल होऊं
देऊं नको.
१३४ मनुष्याच्या बलात्कारापासून मला मुक्त कर,
म्हणजे मी तुझे विधि पाळीन.
१३५ तूं आपला मुखप्रकाश आपल्या दासावर पाड;
आणि तुझे नियम मला शिकीव.
१३६ मनुष्यें तुझें शास्त्र पाळीत नाहींत,
म्हणून माझ्या डोळ्यांतून अश्रूंचे प्रवाह चालतात.

१३७ हे परमेश्वरा, तूं न्यायी आहेस;
तुझे निर्णय सरळ आहेत.
१३८ तूं आपले निर्बंध न्याय्य व पूर्ण विश्वसनीय
असे लावून दिले आहेत.
१३९ माझ्या आस्थेनें मला ग्रासून टाकिलें आहे;
कारण माझे शत्रु तुझीं वचनें विसरले आहेत.
१४० तुझें वचन अगदीं शुद्ध आहे;
तें तुझ्या दासाला प्रिय आहे;
१४१ मी क्षुद्र व तुच्छ आहें,
तरी मी तुझे विधि विसरत नाहीं.
१४२ तुझें न्याय्यत्व हें सनातन न्याय्यत्व आहे,
आणि तुझें शास्त्र सत्य आहे.
१४३ मी संकटांत व क्लेशांत सांपडलों आहें;
तरी तुझ्या आज्ञा मला आनंददायी आहेत.

१४४ तुझे निर्बंध सनातन व न्याय्य आहेत;
मला बुद्धि दे म्हणजे मी वांचेन.

१४५ मी अगदीं मनापासून तुझा धावा करितों;
हे परमेश्वरा, तूं माझें ऐक;
मी तुझे नियम पाळीन.
१४६ मी तुझा धावा करितों; तूं मला तार,
म्हणजे मी तुझे निर्बंध पाळीन;
१४७ उजाडण्यापूर्वी उठून मी आरोळी करितों;
मी तुझ्या वचनांची आशा धरितों.
१४८ तुझ्या वचनाचें चिंतन करावयास
रात्रीच्या प्रत्येक प्रहरापूर्वी
मी डोळे उघडून जागा असतों.
१४९ तूं आपल्या सप्रेम दयेनें माझी वाणी ऐक;
हे परमेश्वरा, तूं आपल्या निर्णयांस अनुसरून
मला नवजीवन दे.
१५० दुष्कर्म योजणारे जवळ आले आहेत;
ते तुझ्या शास्त्रापासून दूर आहेत.
१५१ हे परमेश्वरा, तूं जवळ आहेस;
तुझ्या सर्व आज्ञा सत्य आहेत.
१५२ तुझ्या निर्बंधांवरून मला पूर्वीपासून ठाऊक
आहे कीं
ते तूं सर्वकाळासाठीं स्थापिले आहेत.

१५३ माझें दुःख पाहा, त्यापासून मला मुक्त कर;
कारण मी तुझें शास्त्र विसरलों नाहीं.
१५४ माझा वाद तूं चालीव, मला मुक्त कर;
तूं आपल्या वचनाप्रमाणें मला नवजीवन दे.
१५५ तारण दुर्जनांपासून दूर आहे;
कारण ते तुझ्या नियमांकडे लक्ष पुरवीत नाहींत.
१५६ हे परमेश्वरा, तुझी करुणा थोर आहे;
तूं आपल्या निर्णयांस अनुसरून
मला उत्तेजित कर.
१५७ माझ्या पाठीस लागणारे व माझे शत्रु
बहुत आहेत.
तरी मी तुझ्या निर्बंधांपासून ढळलों नाहीं.
१५८ विश्वासघातक्यांस पाहून मला वीट
आला आहे;
कारण ते तुझें वचन पाळीत नाहींत.
१५९ तुझे विधि मी किती प्रिय मानीत आहें तें पाहा;
हे परमेश्वरा, तूं आपल्या सप्रेम दयेनें मला
उत्तेजित कर.
१६० तुझें एकंदर वचन सत्य आहे;
तुझे सर्व रास्त निर्णय सनातन आहेत.

१६१ अधिपति माझ्या पाठीस विनाकारण लागले
आहेत;
परंतु माझें हृदय तुझ्या वचनांचें भय धरितें.
१६२ मोठा धनसंचय सांपडलेल्या मनुष्याला जसा
आनंद होतो
तसा तुझ्या वचनाविषयीं मला होतो.
१६३ मी असत्याचा द्वेष करितों व त्याचा वीट
मानितों;
परंतु तुझ्या शास्त्रावर माझी आवड आहे.
१६४ तुझ्या रास्त निर्णयांस्तव
मी दिवसांतून सात वेळां तुझें स्तवन करितों.
१६५ तुझें शास्त्र प्रिय मानणाऱ्यांस फार शांति असते.
त्यांस कशाचाहि अडखळा नाहीं.
१६६ हे परमेश्वरा, मी तूं सिद्ध केलेल्या तारणाची आशा
धरितों; तुझ्या आज्ञा मीं पाळिल्या आहेत.
१६७ माझा जीव तुझे निर्बंध पाळितो;
व ते मला अत्यंत प्रिय आहेत.
१६८ मी तुझे विधि व तुझे निर्बंध पाळिलों;
माझा सर्व वर्तनक्रम तुजपुढें आहे.

१६९ हे परमेश्वरा, माझी आरोळी तुजपर्यंत पोहंचो;
तूं आपल्या वचनानुसार मला बुद्धि दे.
१७० माझी विनंति तुजपुढें येवो;
तूं आपल्या वचनानुसार मला मुक्त कर.
१७१ तूं मला आपले नियम शिकवितोस

म्हणून माझ्या मुखांतून स्तुतीचा प्रवाह निघो.
१७२ माझी जिव्हा तुझ्या वचनाची स्तुति गावो;
कारण तुझ्या सर्व आज्ञा न्याय्य आहेत.
१७३ तुझा हात मला साहाय्य करो;
कारण मीं तुझे विधि स्वीकारिले आहेत.
१७४ हे परमेश्वरा, तूं सिद्ध केलेल्या तारणाची मीं उत्कंठा धरिली आहे;
तुझें शास्त्र मला आनंददायी आहे.
१७५ माझा जीव वांचो, म्हणजे तो तुझी स्तुति करील;
तुझे निर्णय मला साहाय्य करोत.
१७६ हरवलेल्या मेंढरासारखा मी हरवलों आहें;
आपल्या दासाचा शोध कर;
कारण मी तुझ्या आज्ञा कधीं विसरलों नाहीं.

## १२० [ उत्क्रमणस्तोत्र ]

१ मीं संकटांत असतां परमेश्वराचा धावा केला,
आणि त्यानें माझें ऐकलें.
२ हे परमेश्वरा, माझा जीव असत्य वाणीपासून,
कपटी जिव्हेपासून मुक्त कर.
३ अगे कपटी जिव्हे, तुला काय मिळणार ?
आणखी तुला काय मिळणार ?
४ वीरांचे तीक्ष्ण बाण
आणि रतम लाकडाचे निखारे.
५ हाय हाय ! मी मेशेखांत प्रवासी होऊन राहतों,
केदाराच्या डेऱ्यांजवळ राहतों.
६ शांतीचा द्वेष करणाऱ्याजवळ
माझ्या जिवाचें राहणें बहुत काळ झालें.
७ मी शांतिप्रिय आहें;
तरी मी बोलतांच ते लढाईस उठतात.

## १२१ [ उत्क्रमणस्तोत्र ]

१ मी आपली दृष्टि पर्वतांकडे लावितों;
मला साहाय्य कोठून येईल ?
२ आकाशाचा व पृथ्वीचा निर्माणकर्ता जो परमेश्वर
त्याजपासून मला साहाय्य येतें.
३ तो तुझा पाय कदापि ढळूं देत नाहीं;
तुझ्या रक्षकास झोप लागत नाहीं.
४ पाहा, इस्राएलाच्या रक्षकाला झोप लागत नाहीं
व तो डुलकीहि घेत नाहीं.
५ परमेश्वर तुझा रक्षक आहे;
परमेश्वर तुझ्या उजव्या हाताला तुला सावली आहे.
६ दिवसां सूर्य व रात्रीं चंद्र
तुला बाधा करणार नाहीं.
७ परमेश्वर सर्व अनिष्टांपासून तुझें रक्षण करील;
तुझ्या जिवाचें रक्षण करील.
८ परमेश्वर तुझें येणेंजाणें
आतांपासून सर्वकाळ सुरक्षित करील.

## १२२ [ दाविदाचें उत्क्रमणस्तोत्र ]

१ आपण परमेश्वराच्या मंदिराला जाऊं असें ते मला म्हणाले;
तेव्हां मला आनंद झाला.
२ हे यरुशलेमा,
तुझ्या द्वारांत आमचे पाय उभे आहेत.
३ हे यरुशलेमा, मजबूत रचलेल्या शहरासारखें
तूं बांधिलेलें आहेस.
४ तुझ्याकडे वंश, परमेश्वराचे वंश,
परमेश्वराच्या नामाचें उपकारस्मरण करावयास चढून जातात,
हीच इस्राएलास साक्ष होय.
५ कारण तेथें न्यायासनें,
दाविदाच्या घराण्याचीं सिंहासनें मांडिलीं आहेत.
६ यरुशलेमाच्या कुशलासाठीं प्रार्थना करा;
तुजवर प्रीति करणाऱ्यांचें क्षेम असो.
७ तुझ्या कोटांत शांति असो;
तुझ्या मंदिरांत क्षेमकुशल असो.
८ माझे बंधु व माझे मित्र यांजकरितां
तुजमध्यें शांति वसो,
अशी मी प्रार्थना करीन.

९ परमेश्वर आमचा देव याच्या मंदिराप्रीत्यर्थ
तुझ्या कल्याणासाठीं मी झटत जाईन.

## १२३ [ उत्क्रमणस्तोत्र ]

१ हे स्वर्गांत सिंहासनारूढ असणाऱ्या,
मी आपली दृष्टि वर तुजकडे लावितों.
२ पाहा, जसे दासांचे डोळे आपल्या धन्याच्या हाताकडे असतात,
जसे दासीचे डोळे आपल्या धनिणीच्या हाताकडे असतात,
तसे परमेश्वर आमचा देव आम्हांवर कृपा करीपर्यंत
त्याच्याकडे आमचे डोळे लागलेले असतात.
३ हे परमेश्वरा, आम्हांवर कृपा कर, आम्हांवर कृपा कर;
कारण आमची पुरी छीथू होत आहे.
४ सुखवस्तु लोकांनीं केलेला उपहास आणि गर्विष्ठांनीं केलेली छीथू
यांनीं आमच्या जिवाला पुरेपुरें करून टाकलें आहे.

## १२४ [ दाविदाचें उत्क्रमणस्तोत्र ]

१ इस्राएल आतां म्हणो कीं
जर परमेश्वर आमच्या पक्षाचा नसता,
२ लोक आम्हांवर उठले तेव्हां
जर परमेश्वर आमच्या पक्षाचा नसता,
३ तर त्यांचा क्रोध आम्हांवर भडकला त्या वेळीं
त्यांनीं आम्हांस जीवंत गिळून टाकिलें असतें;
४ जलांनीं आम्हांस बुडविलें असतें,
त्यांचा लोंढा आमच्या प्राणावरून गेला असता;
५ खळखळलेले लोंढे
आमच्या जिवावरून गेले असते.
६ परमेश्वराचा धन्यवाद होवो;
त्यानें आम्हांस त्यांच्या दाढांत, भक्ष्य म्हणून पडूं दिलें नाहीं.
७ जसा पक्षी पारध्यांच्या पाशांतून सुटतो
तसा आमचा जीव मुक्त झाला आहे;
पाश तुटून आम्ही मुक्त झालों आहों.
८ आकाश व पृथ्वी यांचा निर्माणकर्ता जो परमेश्वर
त्याच्या नामामुळें आम्हांस साहाय्य मिळतें.

## १२५ [ उत्क्रमणस्तोत्र ]

१ ज्यांची श्रद्धा परमेश्वरावर आहे
ते, जो सीयोन पर्वत निश्चल असून सर्वकाळ टिकतो, त्यासारखे आहेत.
२ यरुशलेमाच्या सभोवतीं डोंगर आहेत,
तसा परमेश्वर आतांपासून सर्वकाळपर्यंत आपल्या लोकांसभोवतीं आहे.
३ दुर्जनांची दंडेली धार्मिकांच्या वतनावर राहणार नाहीं;
तेणेंकरून धार्मिक आपले हात दुष्कर्मास लावणार नाहींत.
४ हे परमेश्वरा, जे चांगले व सरळ मनाचे आहेत,
त्यांचें कल्याण कर.
५ जे आपल्या कुटिल मार्गाकडे वळतात
त्यांस परमेश्वर दुष्कर्म्यांबरोबर घालवून देईल.
इस्राएलास शांति असो.

## १२६ [ उत्क्रमणस्तोत्र ]

१ सीयोनांतून धरून नेलेल्या लोकांना जेव्हां परमेश्वरानें परत आणिलें
तेव्हां आम्ही स्वप्नांत आहों असें आम्हांस वाटलें.
२ तेव्हां आमचें मुख हास्यानें व आमची जिव्हा जयघोषानें भरली;
त्या समयीं अन्य राष्ट्रांतील लोक म्हणूं लागले कीं
परमेश्वरानें यांच्यासाठीं महत्कृत्यें केलीं.
३ परमेश्वरानें आम्हांसाठीं महत्कृत्यें केलीं आहेत
त्यामुळें आम्हांस अत्यानंद झाला आहे.
४ हे परमेश्वरा, दक्षिणेकडल्या ओढ्यांप्रमाणें
आम्हांस बंदिवासांतून परत आण.
५ जे अश्रूपूर्ण नेत्रांनीं पेरणी करितात
ते हर्षानें कापणी करितील.
६ जो रडत रडत पाभर धरितो

तो खात्रीनें आनंद करीत आपल्या पेंढ्या घेऊन
येईल.

१२७ [ शलमोनाचें उत्क्रमणस्तोत्र ]

१ परमेश्वर घर बांधीत नाहीं
तर तें बांधणाऱ्यांचे श्रम व्यर्थ आहेत;
परमेश्वर नगर रक्षीत नाहीं
तर पाहरेकऱ्याचें जागणें व्यर्थ आहे.
२ तुम्ही पहाटेस उठतां, उशिरानें विश्रांति घेतां,
व कष्ट करून अन्न खातां,
पण तुमचें हें करणें व्यर्थ आहे;
तोच आपल्या प्रियजनांस लागेल तें झोपेंतहि देतो.
३ पाहा, संतति ही परमेश्वरानें दिलेलें धन आहे,
पोटचें फळ त्याची देणगी आहे.
४ तरुणपणांतले पुत्र
हे वीराच्या हातांतील बाणांप्रमाणें आहेत.
५ ज्या पुरुषाचा भाता अशांनीं भरला आहे
तो धन्य!
वेशीवर शत्रूंशीं त्यांची बोलाचाली होत असतां
ते ओशाळणार नाहींत.

१२८ [ उत्क्रमणस्तोत्र ]

१ धन्य तो पुरुष, जो परमेश्वराचें भय धरितो,
जो त्याच्याच मार्गांनीं चालतो.
२ तूं आपल्या श्रमाचें फळ खाशील;
तूं सुखी होशील, तुझें कल्याण होईल.
३ तुझ्या माजघरांत तुझी स्त्री जणूं काय
द्राक्षीच्या सफळ वेलांसारखी होईल;
तुझीं मुलें तुझ्या मेजासभोंवतीं जैतुनाच्या
रोप्यांसारखीं होतील.
४ पाहा, परमेश्वराचें भय धरणारा पुरुष
याप्रमाणें आशीर्वाद पावेल.
५ परमेश्वर सीयोनांतून तुला आशीर्वाद देवो
आणि तुझ्या आयुष्याचे सर्व दिवस यरुशलेमाचें
कल्याण तुझ्या दृष्टीस पडो.
६ तुझ्या मुलांचीं मुलें तुझ्या दृष्टीस पडोत.
इस्राएलास शांति असो.

१२९ [ उत्क्रमणस्तोत्र ]

१ आतां इस्राएलास म्हणूं दे कीं
माझ्या तरुणपणापासून त्यांनीं
मला फार पीडिलें आहे;
२ माझ्या तरुणपणापासून त्यांनीं
मला फार पीडिलें आहे;
तरी माझ्याविरुद्ध त्यांचें कांहीं चाललें नाहीं.
३ नांगऱ्यांनीं माझी पाठ नांगरिली;
त्यांनीं आपल्या नांगरांनीं लांबलांब तासें काढिलीं.
४ परमेश्वर न्यायी आहे;
दुर्जनांनीं लाविलेल्या जुंपण्या त्यानें तोडिल्या.
५ जे कोणी सीयोनाशीं वैर करितात ते लज्जित होवोत
आणि मागें फिरोत.
६ धाब्यांवर गवत उगवतें न उगवतें तोंच तें सुकून जातें,
त्याप्रमाणें ते होवोत;
७ कापणारा त्यानें आपली मूठ भरीत नाहीं,
पेंढ्या बांधणारा त्यानें आपली कव भरीत नाहीं.
८ जवळून येणारेजाणारे त्यांस एवढेंसुद्धां म्हणत
नाहींत कीं,
परमेश्वराचा आशीर्वाद तुम्हांला प्राप्त होवो.
परमेश्वराच्या नामानें आम्ही तुम्हांस आशीर्वाद
देतों.

१३० [ उत्क्रमणस्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, मी शोकसागरांतून तुझा धावा
करीत आहें.
२ हे प्रभू, माझी वाणी ऐक;
माझ्या विनवणीच्या शब्दांकडे तुझे कान लागोत.
३ हे परमेश्वरा, तूं पापें लक्षांत आणिशील,
तर हे प्रभू, तुजपुढें कोण टिकाव धरील?
४ तरी पण लोकांनीं तुझें भय धरावें
ह्याकरितां तुझ्या ठायीं क्षमा आहे.

५ मी परमेश्वराची अपेक्षा करितों,
माझा जीव अपेक्षा करितो,
आणि मी त्याच्या वचनाची आशा धरितों.
६ पहाटेची वाट पाहणाऱ्या पहारेकऱ्यांपेक्षां,
पहाटेची वाट पाहणाऱ्या पहारेकऱ्यांपेक्षां,
माझा जीव प्रभूची अधिक वाट पाहतो.
७ हे इस्राएला, परमेश्वराची आशा धर,
कारण परमेश्वर दयानिधि आहे;
त्याजजवळ उद्धारदानें विपुल आहेत.
८ तो इस्राएलास त्याच्या सर्व पातकांपासून मुक्त करील.

## १३१ [ दाविदाचें उत्क्रमणस्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, माझें मन गर्विष्ठ नाहीं,
माझी दृष्टि उन्मत्त नाहीं;
आणि मोठमोठ्या व मला असाध्य अशा गोष्टींच्या
भानगडींत मी पडत नाहीं.
२ खरोखरच मीं आपला जीव स्वस्थ व शांत
ठेविला आहे;
दूध तुटलेलें बाळक आईबरोबर असतें
तसा माझा जीव दूध तुटलेल्या बाळकासारखा
माझ्या ठायीं आहे.
३ हे इस्राएला, आतांपासून सर्वकाळपर्यंत
तूं परमेश्वराची आशा धरून राहा.

## १३२ [ उत्क्रमणस्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, दाविदाप्रीत्यर्थ
त्याच्या सर्व कष्टाचें स्मरण कर.
२ त्यानें परमेश्वराजवळ प्रतिज्ञा केली,
याकोबाच्या समर्थ प्रभूस नवस केला कीं
३ मी आपल्या राहण्याच्या तंबूंत जाणार नाहीं,
आपल्या निजावयाच्या पलंगावर चढणार नाहीं;
४ मी आपल्या डोळ्यांस झोप
आपल्या पापण्यांस तंद्री लागूं देणार नाहीं;
५ परमेश्वरासाठीं स्थान,
याकोबाच्या समर्थ प्रभूसाठीं निवासमंडप मिळवी-
पर्यंत मी असेंच करीन.
६ पाहा, कोश एफ्राथांत आहे असें आम्हीं ऐकलें;
तो वैराण प्रदेशांत आम्हांस सांपडला.
७ आपण त्याच्या निवासमंडपांत जाऊं,
त्याच्या पादासनापुढें दंडवत घालूं.
८ हे परमेश्वरा, ऊठ;
तूं आपल्या सामर्थ्याच्या कोशासह आपल्या
विश्रामस्थानीं ये.
९ तुझे याजक धार्मिकतेनें भूषित होवोत;
तुझे भक्त आनंदघोष करोत;
१० तुझा सेवक दावीद याच्याप्रीत्यर्थ
तूं आपल्या अभिषिक्ताचें तोंड मागें फिरवूं नको.
११ परमेश्वरानें दाविदाजवळ खरी शपथ वाहिली आहे;
तो माघार घेणार नाहीं; ती शपथ अशी कीं
मी तुझ्या पोटच्या फळांतलें तुझ्या
सिंहासनावर बसवीन;
१२ तुझीं मुलें माझा करार
व मीं त्यांस शिकविलेले निर्बंध पाळितील,
तर त्यांचींहि मुलें सर्वकाळ तुझ्या
सिंहासनावर बसतील.
१३ परमेश्वरानें सीयोन निवडून घेतलें आहे;
आपल्या निवासासाठीं त्यानें त्याची इच्छा केली आहे.
१४ हें सर्वकाळ माझें विश्रामस्थान आहे;
एथें मी राहीन, कारण हें मला आवडलें आहे.
१५ मी त्याला विपुल अन्नसामग्रीचा आशीर्वाद देईन,
त्याच्यांतल्या दरिद्र्यांस भाकरीनें तृप्त करीन.
१६ मी त्याच्या याजकांस उद्धारानें मंडित करीन;
त्यांतील भक्त मोठा जयघोष करितील.
१७ तेथें दाविदाच्या शृंगास अंकुर फुटेल असें मी करीन;
मीं आपल्या अभिषिक्तासाठीं दीप मांडिला आहे.
१८ मी त्याच्या वैऱ्यांस लज्जेनें वेष्टित करीन;
पण त्याच्या शिरीं त्याचा मुकुट झळकेल.

## १३३ [ दाविदाचें उत्क्रमणस्तोत्र ]

१ पाहा, बंधूंनीं ऐक्यानें एकत्र राहणें

किती चांगलें व मनोहर आहे !
२ तें मस्तकावर घातलेल्या, अहरोनाच्या दाढीवर उतरलेल्या, त्याच्या वस्त्रांच्या कांठापर्यंत आलेल्या,
बहुमोल तेलासारखें आहे;
३ सीयोनाच्या डोंगरांवर उतरणाऱ्या हर्मोनाच्या दहिंवरासारखें तें आहे;
कारण तेथें परमेश्वरानें आशीर्वाद म्हणजे
अनंतकालिक जीवन देण्याचें ठरविलें आहे.

# १३४

[उत्क्रमणस्तोत्र]

१ परमेश्वराच्या मंदिरांत अहोरात्र उभे राहणारे,
परमेश्वराचे सर्व सेवकहो,
तुम्ही परमेश्वराचा धन्यवाद करा;
२ पवित्रस्थानाकडे तोंड करून आपले बाहु उभारा,
आणि परमेश्वराचा धन्यवाद करा;
३ आकाश व पृथ्वी यांचा निर्माणकर्ता परमेश्वर
सीयोनांतून तुला आशीर्वाद देवो.

# १३५

१ परमेश्वराचें स्तवन करा.
परमेश्वराचें नामसंकीर्तन करा;
२ परमेश्वराच्या मंदिरांत, आमच्या देवाच्या मंदिराच्या अंगणांत असणारे
परमेश्वराचे सेवकहो, तुम्ही त्याचें स्तवन करा.
३ परमेश्वराचें स्तवन करा, कारण परमेश्वर चांगला आहे.
त्याच्या नामाचा महिमा गा, कारण तें मनोरम आहे.
४ कारण परमेशानें आपणासाठीं याकोबाला निवडिलें आहे,
आपलें स्वतःचें धन होण्यासाठीं इस्राएलास निवडून घेतलें आहे.
५ कारण परमेश्वर थोर आहे;
आमचा प्रभु सर्व देवांपेक्षां श्रेष्ठ आहे हें मी जाणतों.
६ परमेश्वराला जें कांहीं बरें वाटतें
तें तो आकाशांत व पृथ्वीवर, समुद्रांत व सर्व जलाशयांत करितो.
७ तो दिगंतांपासून मेघ वर चढवितो,
पाऊस पडण्यासाठीं विजा उत्पन्न करितो;
तो आपल्या भांडारांतून वारे बाहेर आणितो.
८ त्यानें मिसर देशांतील मनुष्यांचे व पशूंचेहि
प्रथम जन्मलेले मारून टाकिले.
९ हे मिसर देशा, त्यानें तुजमध्यें, फारो व त्याचे सर्व सेवक
यांजवर चिन्हें व उत्पात पाठविले.
१० त्यानें बहुत राष्ट्रांचा मोड केला;
बलवान् राजे मारून टाकिले.
११ अमोऱ्यांचा राजा सीहोन,
व बाशानाचा राजा ओग यांला मारून टाकिलें;
कनान देशाच्या सर्व राजांचा मोड केला;
१२ आणि त्यांचा देश त्यानें आपले लोक इस्राएल यांस वतन करून दिला.
१३ हे परमेश्वरा, तुझें नाम चिरकाल राहील;
हे परमेश्वरा, तुझें स्मरण पिढयानपिढ्या राहील.
१४ कारण परमेश्वर आपल्या लोकांचा न्याय करील,
त्याला आपल्या सेवकांचा कळवळा येईल.
१५ राष्ट्रांच्या मूर्ति सोन्यारुप्याच्या आहेत,
त्या मनुष्याच्या हातच्या कृति आहेत.
१६ त्यांस तोंड आहे पण बोलतां येत नाहीं;
त्यांस डोळे आहेत पण दिसत नाहीं.
१७ त्यांस कान आहेत पण ऐकूं येत नाहीं;
आणि त्यांच्या मुखांत मुळींच श्वास नाहीं.
१८ त्या बनविणारे व त्यांवर भाव ठेवणारे सर्व त्यांसारखे बनतात.
१९ हे इस्राएलाच्या घराण्या, परमेश्वराचा धन्यवाद कर;
हे अहरोनाच्या घराण्या, परमेश्वराचा धन्यवाद कर;
२० हे लेवीच्या घराण्या, परमेश्वराचा धन्यवाद कर;
परमेश्वराचें भय धरणाऱ्यांनो,
परमेश्वराचा धन्यवाद करा.
२१ यरुशलेमांत वस्ती करणाऱ्या परमेश्वराचा धन्यवाद सीयोनांतून होवो.

१ मुळांत : हालेलूया.

परमेश्वराचें स्तवन करा.

१३६

१ परमेश्वराचें उपकारस्मरण करा,
कारण तो चांगला आहे;
कारण त्याची दया सनातन आहे.
२ देवाधिदेवाचें उपकारस्मरण करा;
कारण त्याची दया सनातन आहे.
३ प्रभूंच्या प्रभूचें उपकारस्मरण करा;
कारण त्याची दया सनातन आहे.
४ जो एकटाच मोठीं अद्भुत कृत्यें करितो त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
५ ज्यानें बुद्धिचातुर्यानें आकाश केलें त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
६ ज्यानें पृथ्वी जलांवर विस्तारिली त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
७ ज्यानें मोठमोठ्या ज्योति निर्माण केल्या त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
८ ज्यानें दिवसा प्रभुत्व चालविण्यासाठीं सूर्य निर्माण केला त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
९ ज्यानें रात्रीं प्रभुत्व चालविण्यासाठीं चंद्र व तारे निर्माण केले त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
१० ज्यानें मिसर देशांतील प्रथम जन्मलेले मारून टाकिले त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
११ ज्यानें मिसरी लोकांतून इस्राएल लोकांस बाहेर आणिलें त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
१२ ज्यानें प्रतापी हस्तानें व पुढें केलेल्या बाहूनें त्यांस बाहेर आणिलें त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
१३ ज्यानें तांबडा समुद्र दुभागिला त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
१४ ज्यानें इस्राएलास त्यामधून पार नेलें त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
१५ ज्यानें फारोला व त्याच्या सैन्याला तांबड्या समुद्रांत गडप केलें त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
१६ ज्यानें आपल्या लोकांस अरण्यांतून नेलें त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
१७ ज्यानें मोठमोठ्या राजांस मारून टाकिलें त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
१८ ज्यानें प्रतापी राजे ठार मारिले त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
१९ ज्यानें अमोऱ्यांचा राजा सीहोन याला ठार मारिलें त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
२० ज्यानें बाशानाचा राजा ओग
याला ठार मारिलें त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
२१ ज्यानें त्यांचा देश वतन करून दिला त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे;
२२ ज्यानें आपला सेवक इस्राएल यास तो वतन करून दिला त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
२३ ज्यानें आमच्या दैन्यावस्थेंत आमची आठवण केली त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
२४ ज्यानें आम्हांस आमच्या शत्रूंपासून सोडविलें त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
२५ जो सर्व प्राण्यांस अन्न देतो त्याचें;
कारण त्याची दया सनातन आहे.
२६ स्वर्गीच्या देवाचें उपकारस्मरण करा;
कारण त्याची दया सनातन आहे.

१३७

१ बाबेलच्या नद्यांजवळ आम्ही बसलों;
हो, तेथें आम्हांला सीयोनाची आठवण झाली;

१ मुळांत : हालेल्या.

तेव्हां आम्ही रडलों.
२ तेथील वाळुंजांवर
आम्हीं आपल्या वीणा टांगून ठेविल्या.
३ कारण तेथें आमचा पाडाव करणाऱ्यांनीं
आम्हांस गाणीं गावयास सांगितलें;
आमचा छळ करणाऱ्यांनीं आम्हांस मौज
करावयास सांगितलें;
ते म्हणाले, आम्हांस सीयोनाचें एकादें गाणें
गाऊन दाखवा.
४ आम्हीं परक्या स्थळीं
परमेश्वराचें गाणें कसें गावें ?
५ हे यरुशलेमा, जर मी तुला विसरलों
तर माझा उजवा हात आपलें कौशल्य विसरो.
६ जर मीं तुझी आठवण ठेविली नाहीं,
जर मीं यरुशलेमाला माझ्या आनंदाच्या मुख्य
विषयाहून अधिक मानिलें नाहीं,
तर माझी जीभ माझ्या टाळूला चिकटो.
७ हे परमेश्वरा, अदोमी लोकांविरुद्ध यरुशलेमाच्या
त्या दिवसाची आठवण ठेव;
ते म्हणाले, तें पाडून टाका, पायापासून
पाडून टाका.
८ अगे बाबेलच्या कन्ये, तूं ओसाड पडणार आहेस;
तूं आम्हांशीं केलेल्या वर्तनाबद्दल जो तुझें पारिपत्य
करील तो धन्य !
९ जो तुझीं बाळकें धरून खडकावर आपटील
तो धन्य !

## १३८ [ दाविदाचें स्तोत्र ]

१ मी अगदीं मनापासून तुझें
उपकारस्मरण करीन;
अन्य देवांच्यासमक्ष तुझीं स्तोत्रें गाईन.
२ तुझ्या पवित्र मंदिराकडे वळून मी तुझी
उपासना करीन,
तुझ्या दयेमुळें व तुझ्या सत्यामुळें मी तुझ्या
नामाचें उपकारस्मरण करीन;
कारण तूं आपल्या संपूर्ण नामाहून
आपल्या वचनाची थोरवी वाढविली आहे.
३ मीं धावा केला तो तूं त्याच दिवशीं ऐकला;
तूं मला हिम्मत दिली तेव्हां माझ्या आत्म्याला
सामर्थ्य प्राप्त झालें.
४ हे परमेश्वरा, पृथ्वीवरील सर्व राजे तुझें उपकार-
स्मरण करितील;
कारण त्यांनीं तुझ्या तोंडचीं वचनें ऐकलीं आहेत.
५ ते परमेश्वराच्या मार्गांविषयीं गातील;
कारण परमेश्वराचा महिमा थोर आहे.
६ परमेश्वर परम थोर आहे तरी तो दीनाकडे लक्ष देतो;
पण गर्विष्ठाला दुरून ओळखितो.
७ मी संकटामध्यें भ्रमत असलों तरी मला तूं
उत्तेजन देतोस;
माझ्या वैऱ्यांच्या क्रोधावर तूं आपला
हात चालवितोस,
आणि तुझा उजवा हात माझा बचाव करितो.
८ परमेश्वर माझें सर्व कांहीं सिद्धीस नेईल;
हे परमेश्वरा, तुझी दया सनातन आहे;
तूं आपल्या हातचें काम मध्येंच सोडूं नको.

## १३९ [ मुख्य गवयासाठीं; दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, तूं मला पारखिलें आहे,
तूं मला जाणतोस.
२ माझें बसणें व माझें उठणें तूं जाणतोस,
तूं दुरून माझें मनोगत समजतोस.
३ तूं माझें चालणें व माझें निजणें बारकाईनें पाहतोस,
आणि माझ्या एकंदर वर्तनक्रमाची माहिती
तुला आहे.
४ हे परमेश्वरा, माझ्या मुखांतून असा एकहि शब्द
येत नाहीं कीं
तो तुला मुळीं ठाऊक नाहीं.
५ तूं मागूनपुढून मला घेरिलें आहे,
माझ्यावर तूं आपला हात ठेविला आहे.
६ हें ज्ञान माझ्या कल्पनेपलीकडे आहे;

हें अगम्य आहे, हें माझ्या आवाक्याबाहेर आहे.
७ मी तुझ्या आत्म्यापासून कोठें जाऊं ?
मी तुझ्या समक्षतेपासून कोठें पळूं ?
८ मी वर आकाशांत चढलों तरी तेथें तूं आहेस;
अधोलोकीं मीं आपलें अंथरूण केलें, तरी पाहा, तेथें तूं आहेस.
९ मी प्रभातपंख धारण करून
समुद्राच्या अगदीं पलीकडल्या तीरावर जाऊन राहिलों,
१० तरी तेथेंहि तुझा हात मला नेईल;
तुझा उजवा हात मला धरून राहील.
११ अंधकार तरी मला लपवो,
मजभोंवतालचा प्रकाश काळोख होवो, असें जरी मी म्हणालों,
१२ तरी अंधकार देखील तुजपासून कांहींएक छपवीत नाहीं, रात्र दिवसाप्रमाणें प्रकाशते,
काळोख आणि उजेड हे तुला सारखेच आहेत.
१३ तूंच माझें अंतर्याम निर्माण केलें;
तूंच माझ्या आईच्या उदरीं माझी घटना केली.
१४ भयजनक व आश्चर्यकारक रीतीनें माझी घटना झाली आहे,
म्हणून मी तुझें उपकारस्मरण करितों;
तुझीं कृत्यें अद्भुत आहेत हें माझा जीव पूर्णपणें जाणून आहे.
१५ मी गुप्त स्थळीं निर्माण होत असतां
आणि पृथ्वीच्या अधोभागीं विलक्षण प्रकारें माझी घटना होत असतां
माझी आकृति तुला गुप्त नव्हती.
१६ मी गर्भांत पिंडरूपानें असतांना तुझ्या नेत्रांनीं मला पाहिलें,
आणि माझा एकहि दिवस उगवण्यापूर्वी
ते सर्व तुझ्या वहींत नमूद करून ठेविले होते.
१७ हे देवा, मला तुझे संकल्प किती मोलवान् आहेत !
त्यांची संख्या किती मोठी आहे !
१८ ते मी गणूं लागलों तर वाळूच्या कणांपेक्षां अधिक ठरतील;
मी जागृत होतों तेव्हां मी तुजजवळच असतों.
१९ हे देवा, तूं दुर्जनास ठार मारून टाक;
अहो रक्तपात करणाऱ्यांनो, मजपासून दूर व्हा;
२० ते तुजविरुद्ध कपटानें बोलतात,
तुझे वैरी तुझें नाम व्यर्थ घेतात.
२१ तुझा द्वेष करणाऱ्यांचा मीं कां द्वेष करूं नये ?
तुजवर उठणाऱ्यांचा मला कां वीट वाटूं नये ?
२२ मी त्यांचा पराकाष्ठेचा द्वेष करितों;
मी त्यांना आपले शत्रु मानितों.
२३ हे देवा, माझी झडती घेऊन माझें हृदय जाण;
मला कसोटीस लावून माझे मनोभाव तपास.
२४ माझ्या ठायीं दुष्टपणाकडे कांहीं प्रवृत्ति असेल तर पाहा;
आणि मला सनातन मार्गानें ने.

## १४० [ मुख्य गवयासाठीं; दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, मला दुष्ट मनुष्यापासून सोडीव;
बलात्कारी पुरुषापासून माझें रक्षण कर.
२ ते आपल्या मनांत दुष्कर्में योजितात;
ते सतत लढाई उपस्थित करितात.
३ ते आपली जीभ सर्पाप्रमाणें तीक्ष्ण करितात.
नागांचें विष त्यांच्या ओठांखालीं आहे. [ सेला ]
४ हे परमेश्वरा, दुर्जनांच्या हातून माझा बचाव कर;
बलात्कारी पुरुषापासून माझें रक्षण कर;
ते माझीं पावलें घसरवूं पाहतात.
५ गर्विष्ठ मजसाठीं पाश व दोऱ्या छपवून मांडितात;
रस्त्याच्या बाजूस जाळें पसरितात;
ते मजसाठीं सापळे मांडितात. [ सेला ]
६ मी परमेश्वराला म्हणतों, तूं माझा देव आहेस;
हे परमेश्वरा, माझ्या विनवण्यांच्या शब्दाकडे कान दे.
७ हे परमेश्वरा, माझ्या तारणसामर्थ्या,
तूं लढाईच्या प्रसंगीं माझें शिरस्त्राण आहेस.
८ हे परमेश्वरा, दुर्जनाच्या इच्छा पुरवूं नको,

त्याची दुष्ट योजना सिद्धीस जाऊं देऊं नको;
नाहीं तर तो उन्मत्त होईल. [ सेला ]
९ ज्यांनीं मला घेरिलें आहे
त्यांच्या वाचेपासून होणारा अनर्थ त्यांच्याच
शिरीं पडो.
१० त्यांच्यावर इंगळ पडोत; ते त्यांस अग्नींत टाकोत,
ज्यांतून त्यांला उठून वर येववणार नाहीं अशा
खाचांत ते टाकण्यांत येवोत.
११ दुर्भाषण करणारा पुरुष पृथ्वीवर टिकणार नाहीं;
बलात्कारी पुरुषाच्या पाठीस अरिष्ट
एकसारखें लागेल.
१२ परमेश्वर दीनाच्या पक्षाचें, दरिद्र्याच्या वादाचें
समर्थन करील,
हें मला ठाऊक आहे.
१३ धार्मिक तुझ्या नामाचें उपकारस्मरण
निश्चयें करितील;
सरळ मनाचे तुजसमोर वसतील.

## १४१ [ दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, मी तुझा धावा करितों;
मजकडे सत्वर ये;
मी तुझा धावा करितों तेव्हां माझ्या वाणीकडे
कान दे.
२ माझी प्रार्थना तुजसमोर धुपाप्रमाणें
माझें हात उभारणें संध्याकाळच्या अर्पणाप्रमाणें,
सादर होवो.
३ हे परमेश्वरा, माझ्या मुखावर पहारा ठेव;
माझ्या वाणीचें द्वार संभाळ.
४ अधर्म करणाऱ्या मनुष्यांबरोबर
दुराचरण करण्यास
माझें मन कोणत्याहि वाईट गोष्टीकडे
वळूं देऊं नको;
मला त्यांचीं मिष्टान्नें खाऊं देऊं नको.
५ धार्मिक मला ममतेनें ताडन करील
व मला बोल लावील,
तरी असें उत्कृष्ट तेल माझें मस्तक
नको म्हणणार नाहीं;
दुर्जनांनीं दुष्टाई केली तरी मी प्रार्थना
करीत राहीन.
६ त्यांच्या अधिपतींस कड्यावरून लोटून दिलें आहे;
आणि ते लोक माझीं वचनें ऐकून समाधान पावतात.
७ कोणी भूमि नांगरितांना व ढेकळें फोडितांना
जशी माती विखरिली जाते,
तशीं आमचीं हाडें अधोलोकाच्या तोंडाशीं विख-
रलीं गेलीं आहेत.
८ हे प्रभू परमेश्वरा, माझे डोळे तुजकडे लागले आहेत;
मीं तुजवर भरवसा टाकिला आहे; माझा जीव
जाऊं देऊं नको.
९ त्यांनीं मजसाठीं मांडिलेल्या पाशापासून
आणि दुष्कर्म्यांच्या सापळ्यांपासून मला राख.
१० दुर्जन आपल्या जाळ्यांत पडोत;
मी तर त्यांतून साफ निसटून जाईन.

## १४२ [ दाविदाचें मास्कील (बोधपर स्तोत्र); गुहेंत असतांना त्यानें केलेली प्रार्थना ]

१ मी आपल्या वाणीनें परमेश्वराला आरोळी मारितों;
आपल्या वाणीनें परमेश्वराची काकळूत करितों.
२ मी त्याच्यापुढें आपलें गाऱ्हाणें मांडितों;
मी आपलें संकट त्याला निवेदन करितों.
३ माझ्याठायीं माझा जीव गळून गेला,
तरी माझी गति तुला ठाऊक होती;
ज्या वाटेनें मी चालतों
तींत त्यांनीं मजसाठीं गुप्तपणें पाश मांडिला आहे.
४ माझ्या उजवीकडे दृष्टि लावून पाहा,
मला ओळखणारा कोणी नाहीं;
मला कशाचाहि आश्रय नाहीं;
माझ्या जिवाची परवा करणारा कोणी नाहीं.
५ हे परमेश्वरा, मी तुला आरोळी मारितों;
मी म्हणतों, तूंच माझा आश्रय आहेस,
जीवंतांच्या भूमींत तूं माझा वतनभाग आहेस.

६ माझ्या आरोळीकडे लक्ष दे,
कारण माझी फार दुर्दशा झाली आहे;
माझा छळ करणाऱ्यांपासून तूं मला सोडीव,
कारण ते मजपेक्षां बलिष्ठ आहेत.
७ मीं तुझ्या नामाचें उपकारस्मरण करावें म्हणून तूं
माझा जीव बंदींतून काढ;
तूं मला औदार्य दाखवितोस,
यास्तव धार्मिक मजविषयीं उल्लास पावतील.

# १४३ [ दाविदाचें स्तोत्र ]

१ हे परमेश्वरा, माझी प्रार्थना ऐक;
माझ्या विनवणीकडे कान दे;
तूं आपल्या सत्यतेनें व न्याय्यत्वानें माझें ऐक.
२ तूं आपल्या दासाबरोबर न्यायवाद करूं नको;
कारण तुजपुढें कोणीहि मनुष्य नीतिमान्
नीतिमान ठरणार नाही.
३ वैरी माझ्या आत्म्याच्या पाठीस लागला आहे;
त्यानें माझा जीव धुळीस मिळविला आहे;
पुरातन काळच्या मृतांप्रमाणें मला त्यानें
अंधकाराच्या स्थलीं ठेविलें आहे.
४ माझा जीव माझ्या ठायीं गळून गेला आहे;
माझें अंतर्याम घाबरें झालें आहे.
५ मी प्राचीन काळचे दिवस मनांत आणितों;
तुझ्या सर्व कृत्यांचें मनन करितों;
तुझ्या हातच्या कृतींचें चिंतन करितों.
६ मी आपले हात तुजपुढें पसरितों;
शुष्क भूमीप्रमाणें माझा आत्मा तुजसाठीं तान्हेला
झाला आहे.
७ हे परमेश्वरा, त्वरा करून माझें ऐक; माझा जीव
गळून गेला आहे;
तूं आपलें मुख मजपासून लपवूं नको;
लपविशील तर गर्तेत उतरणाऱ्यांसारखा
मी होईन.
८ प्रातःकाळीं तुझ्या सप्रेम दयेचे शब्द मला ऐकूं दे;
कारण तुजवर माझा भाव आहे;
ज्या मार्गानें मीं चालावें तो मला कळीव;
कारण मीं आपलें चित्त तुझ्याकडे लाविलें आहे.
९ हे परमेश्वरा, माझ्या वैऱ्यांपासून मला मुक्त कर;
मी पळून येऊन तुजकडे लपलों आहें.
१० तुझ्या इच्छेप्रमाणें वागण्यास मला शिकीव;
कारण तूं माझा देव आहेस;
तुझा उत्तम आत्मा मला सद्धर्मभूमींत नेवो.
११ हे परमेश्वरा, तूं आपल्या नामास्तव मला
नवजीवन दे;
तूं आपल्या न्यायानें माझा जीव संकटांतून काढ.
१२ तूं आपल्या दयेनें माझ्या वैऱ्यांचा नायनाट कर;
माझ्या जिवास गांजणाऱ्या सर्वांचा नाश कर;
कारण मी तुझा दास आहें.

# १४४ [ दाविदाचें स्तोत्र ]

१ परमेश्वर जो माझा दुर्ग त्याचा धन्यवाद होवो;
तो माझ्या हातांस लढाइयास शिकवितो;
माझ्या बोटांस युद्धकौशल्य शिकवितो.
२ तो माझा दयानिधि, माझा दुर्ग,
माझा गड, माझा मुक्तिदाता, माझी ढाल आहे;
मी त्याचा आश्रय धरितों;
तो माझ्या प्रजाजनांस माझे अंकित करितो.
३ हे परमेश्वरा, मनुष्य तो काय कीं तूं त्याची
ओळख ठेवावी ?
मानवजाति ती काय कीं तूं तिच्याकडे लक्ष पुरवावें ?
४ मनुष्य श्वासवत् आहे;
त्याचें आयुष्य नश्वर छायेसारखें आहे.
५ हे परमेश्वरा, तूं आपलें आकाश लववून
खालीं उतर;
पर्वतांस स्पर्श कर म्हणजे ते धुमसतील.
६ वीज पाडून त्यांची दाणादाण कर;
तूं आपले बाण सोडून त्यांची धांदल उडीव.
७ वरून आपले हात लांब कर;
व महापुरांतून, परक्यांच्या हातांतून,
मला सोडवून मुक्त कर.

८ त्यांचें मुख असत्य वदतें;
त्यांचा उजवा हात असत्याचा हात आहे.
९ हे देवा, मी तुला नवें गीत गाईन;
दहातारी वीणेवर मी तुझें स्तोत्र गाईन;
१० तूंच राजांस तारण देणारा आहेस;
तूंच आपला सेवक दावीद याला दुष्टांच्या
तरवारीपासून मुक्त करणारा आहेस.
११ मला परक्यांच्या हातांतून सोडवून मुक्त कर;
त्यांचें मुख असत्य बोलतें;
त्यांचा उजवा हात असत्याचा हात आहे.
१२ आमचे पुत्र आपल्या तारुण्याच्या भरांत उंच
वाढलेल्या रोप्यांसारखे आहेत;
आमच्या कन्या राजमंदिराच्या कोपऱ्यांच्या
कोरलेल्या खांबांसारख्या आहेत;
१३ आमचीं भांडारें भरलेलीं आहेत;
त्यांतून सर्व प्रकारच्या वस्तु मिळतात;
आमच्या कुरणांत आमचीं मेंढरें सहस्रपट,
दशसहस्रपट वाढतात;
१४ आमचे बैल लादलेले आहेत;
दरोडे, धरपकड व आक्रांत हे आमच्या
रस्त्यांत नाहींत;
१५ ज्या लोकांची स्थिति अशी आहे ते धन्य!
ज्या लोकांचा देव परमेश्वर आहे ते धन्य!

## १४५ [ दाविदाचें स्तोत्र ]

१ हे माझ्या देवा राजा, मी तुझा महिमा वर्णीन;
आणि सदासर्वकाळ तुझ्या नामाचा
धन्यवाद करीन.
२ मीं प्रतिदिवशीं तुझा धन्यवाद करीन;
आणि सदासर्वकाळ तुझ्या नामाचें स्तवन करीन.
३ परमेश्वर थोर व परमस्तुत्य आहे;
त्याची थोरवी अगम्य आहे.
४ एक पिढी दुसऱ्या पिढीला तुझ्या कृत्यांची प्रशंसा
करीत राहील,
त्या तुझ्या पराक्रमांचें वर्णन करितील.
५ तुझ्या वैभवाचा गौरवयुक्त प्रताप
व तुझीं अद्भुत कृत्यें यांचें मी मनन करीन.
६ तुझ्या भयावह कृत्यांचें प्राबल्य लोक
विदित करितील;
मी तुझें माहात्म्य वर्णीन.
७ ते तुझ्या परमकृपेची आठवण काढितील;
व तुझ्या न्याय्यत्वाचे पोवाडे गातील.
८ परमेश्वर कृपाळू व कन्हवाळू आहे;
तो मंदक्रोध व अतिदयाळू आहे.
९ परमेश्वर सगळ्यांला चांगला आहे;
त्याची कृपा त्यानें केलेल्या
सर्व कृत्यांवर आहे.
१० हे परमेश्वरा, तुझीं सर्व कृत्यें
तुझीं स्तुतिस्तोत्रें गातात;
आणि तुझे भक्त तुझा धन्यवाद करितात.
११ ते तुझ्या राज्याचा महिमा वर्णितात,
आणि तुझा पराक्रम कथन करितात;
१२ यासाठीं कीं तुझे पराक्रम
व तुझ्या राज्याचें प्रबल वैभव हीं
मानवजातीस कळावीं.
१३ तुझें राज्य युगानुयुग राहणारें राज्य आहे,
तुझा राज्याधिकार पिढ्यानपिढ्यांचा आहे.
१४ परमेश्वर पतन पावणाऱ्या सर्वांस आधार देतो,
व वाकलेल्या सर्वांस उभे करितो.
१५ सर्वांचे नेत्र तुजकडे लागतात;
आणि तूं त्यांस त्यांचा आहार वेळेवर पुरवितोस.
१६ तूं आपली मूठ उघडून
सर्व प्राणिमात्रांची इच्छा पुरी करितोस.
१७ परमेश्वर आपल्या सर्व मार्गांत न्यायपर आहे,
तो आपल्या सर्व कृत्यांत दयाळू आहे.
१८ जे कोणी त्याचा धावा करितात,
जे खऱ्या भावानें त्याचा धावा करितात,
त्या सर्वांस परमेश्वर समीप आहे.
१९ तो आपलें भय धरणाऱ्यांची इच्छा पुरवितो;
व त्यांची आरोळी ऐकून त्यांस तारितो.

२० परमेश्वर आपल्यावर प्रेम करणाऱ्या सर्वांचें रक्षण करितो;
पण सर्व दुर्जनांचा नाश करितो.
२१ माझें मुख परमेश्वराचें स्तवन करील;
प्राणिमात्र त्याच्या पवित्र नामाचा धन्यवाद युगानुयुग करो.

१४६

१ परमेश्वराचें स्तवन करा.
हे माझ्या जिवा, परमेश्वराचें स्तवन कर.
२ माझ्या जिवांत जीव आहे तोंवर मी परमेश्वराचें स्तवन करीन;
मला अस्तित्व आहे तोंपर्यंत माझ्या देवाचें स्तोत्र गाईन.
३ अधिपतींवर भरवसा ठेवूं नका;
मनुष्यावर भरवसा ठेवूं नका;
त्याच्याकडून साहाय्य मिळणें शक्य नाहीं.
४ त्याचा प्राण जातो, तो आपल्या मातीस पुनः मिळतो;
त्याच वेळीं त्याच्या योजनांचा शेवट होतो.
५ ज्याच्या साहाय्यास याकोबाचा देव आहे,
ज्याची आशा आपला देव परमेश्वर यावर आहे,
तो धन्य.
६ त्यानेंच आकाश, पृथ्वी, समुद्र व त्यांतलें सर्व कांहीं निर्माण केलें;
तो सदा आपलें सत्य वचन पाळितो.
७ तो छळलेल्यांचा न्यायनिवाडा करितो;
भुकेल्यांस अन्न देतो;
परमेश्वर बंदिवानांस मोकळे करितो.
८ परमेश्वर अंधळ्यांस दृष्टि देतो;
परमेश्वर वाकलेल्यांस उभे करितो;
परमेश्वर धार्मिकांवर प्रेम करितो.
९ परमेश्वर उपऱ्यांचें रक्षण करितो;
अनाथ व विधवा यांची दाद घेतो;
परंतु दुर्जनांचा मार्ग विपरीत करितो.
१० परमेश्वर सर्वकाळ राज्य करितो;
हे सीयोना, तुझा देव पिढ्यानपिढ्या राज्य करितो.
परमेश्वराचें स्तवन करा.

१ मुळांत : हालेलूया.

१४७

१ परमेश्वराचें स्तवन करा.
कारण आमच्या देवाचीं स्तोत्रें गाणें चांगलें आहे,
आल्हादकारक आहे, आणि स्तोत्रगान शुभत्र आहे.
२ परमेश्वर यरुशलेम पुनः बांधून वसवितो;
बाहेर घालवून दिलेल्या इस्राएलांस तो एकत्र करितो.
३ भग्नहृदयी जनांस तो बरें करितो;
तो त्यांच्या जखमांस पट्टया बांधितो.
४ तो ताऱ्यांची गणती करितो;
तो त्या सर्वांस त्यांचीं त्यांचीं नांवें देतो.
५ आमचा प्रभु थोर व महासमर्थ आहे;
त्याची बुद्धि अति विशाल आहे.
६ परमेश्वर दीनांची दाद घेतो;
तो दुर्जनांस धुळीस मिळवितो.
७ तुम्ही परमेश्वराचें उपकारस्मरण करून त्याची कीर्ति वर्णा;
वीणेवर आमच्या देवाचीं स्तोत्रें गा.
८ तो मेघांनीं आकाश आच्छादितो;
तो भूमीकरितां पर्जन्य तयार करितो,
डोंगरांवर गवत रुजवितो.
९ तो पशूंस व कावकाव करणाऱ्या
कावळ्यांच्या पिलांस त्यांचें अन्न देतो.
१० तो घोड्याच्या बलानें आनंदित होत नाहीं,
मनुष्याच्या पायांनीं संतोष पावत नाहीं.
११ जे परमेश्वराचें भय धरितात,
जे त्याच्या दयेची प्रतीक्षा करितात,
त्यांजवर तो प्रसन्न होतो.
१२ हे यरुशलेमा, परमेश्वराचें गौरव कर;
हे सीयोना, तूं आपल्या देवाचें स्तवन कर.
१३ कारण त्यानें तुझ्या वेशींचे अडसर बळकट केले आहेत;

१ मुळांत : हालेलूया.

त्यानें तुझ्या ठायीं तुझ्या मुलांस आशीर्वाद
दिला आहे.
१४ तो तुझ्या सीमांच्या आंत शांतता पसरितो;
उत्कृष्ट गव्हानें तुला तृप्त करितो;
१५ तो आपली आज्ञा पृथ्वीवर पाठवितो;
त्याचा शब्द फार वेगानें धावतो.
१६ तो लोकरीसारखें हिम पाडितो;
राखेसारखे दंवाचे कण पसरितो.
१७ तो आपल्या बर्फाच्या तुकड्यांचा वर्षाव करितो.
त्याच्या हिमापुढें कोण टिकेल ?
१८ तो आपला हुकूम पाठवून ते विरघळवितो;
तो आपला वारा वाहवितो तेव्हां पाणी वाहूं लागतें.
१९ तो याकोबास आपलें वचन,
इस्राएलास आपले नियम व निर्णय विदित करितो.
२० कोणत्याहि राष्ट्राबरोबर त्यानें असें वर्तन केलें नाहीं;
त्याचे निर्णय तीं जाणत नाहींत.
परमेश्वराचें स्तवन करा.

## १४८

१ परमेश्वराचें[1] स्तवन करा.
आकाशांतून परमेश्वराचें स्तवन करा;
ऊर्ध्व लोकीं त्याचें स्तवन करा.
२ अहो त्याच्या सर्व दिव्यदूतांनो, त्याचें स्तवन करा;
त्याच्या सर्व सैन्यांनो, त्याचें स्तवन करा;
३ अहो सूर्यचंद्रहो, त्याचें स्तवन करा;
सर्व प्रकाशमय ताऱ्यांनो, त्याचें स्तवन करा.
४ आकाशांवरील आकाशांनो, त्याचें स्तवन करा.
आकाशांवरील जलांनो, त्याचें स्तवन करा.
५ तीं परमेश्वराच्या नामाचें स्तवन करोत;
कारण त्यानें आज्ञा केली आणि तीं निर्माण झालीं.
६ त्यानें तीं सर्वकाळासाठीं स्थापिलीं;
त्यानें नियम लावून दिला त्याचें उल्लंघन कोणी
करणार नाहीं.
७ पृथ्वीवरून परमेश्वराचें स्तवन करा,
मोठमोठे जलचर व सर्व जलाशय,

[1] मुळांत : हालेलूया.

८ अग्नि, गारा, हिम व धुकें,
त्याची आज्ञा सिद्धीस नेणारें वादळ,
९ पर्वत व सर्व डोंगर,
फळझाडें व सर्व गंधसरू,
१० वनपशु व सर्व ग्रामपशु,
सरपटणारे प्राणी व उडणारे पक्षी,
११ पृथ्वीवरील राजे व सर्व प्रजा,
अधिपति व पृथ्वीवरील सर्व न्यायाधीश,
१२ कुमार व कुमारी,
वृद्ध व तरुण,
१३ हीं सगळीं परमेश्वराच्या नामाचें स्तवन करोत;
कारण केवळ त्याचेंच नाम उच्च आहे;
त्याचें ऐश्वर्य पृथ्वी व आकाश यांच्यावर आहे.
१४ आणि त्यानें आपल्या लोकांचें शिंग पुनः उभारिलें,
हें त्याच्या सर्व भक्तांस,
त्याच्यासन्निध असलेल्या लोकांस म्हणजे इस्रा-
एलाच्या संततीस स्तुतिपात्र झालें आहे.
परमेश्वराचें स्तवन करा.

## १४९

१ परमेश्वराचें[1] स्तवन करा;
नवें गीतगाऊन परमेश्वराचें गुणगान करा.
भक्तांच्या सभेंत त्याचें स्तुतिस्तोत्र गा.
२ इस्राएल आपल्या निर्माणकर्त्याच्या ठायीं
आनंद करो;
सीयोनाचीं मुलें आपल्या राजाच्या ठायीं
उल्लास पावोत.
३ तीं नृत्य करीत त्याच्या नामाचें स्तवन करोत.
डफ व वीणा यांवर त्याला स्तुतिस्तोत्रें गावोत.
४ कारण परमेश्वर आपल्या लोकांवर प्रसन्न आहे;
तो दीनांस तारणानें सुशोभित करितो.
५ भक्त गौरवामुळें उल्लसोत;
ते आपल्या अंथरुणांवरून हर्षघोष करोत.
६ परमेश्वराची परमश्रेष्ठ स्तुति त्यांच्या कंठीं असो;
दुधारी तरवार त्यांच्या हातीं असो;

[1] मुळांत : हालेलूया.

७ तिच्या योगें राष्ट्रांचा सूड त्यांनीं उगवावा
आणि लोकांस शासन करावें.
८ त्यांच्या राजांस सांखळदंडांनीं बांधावें
आणि त्यांच्या सरदारांस लोखंडी बेड्या घालाव्या.
९ लिहून ठेविलेला निवाडा त्यांजवर बजावावा,
हें त्याच्या सर्व भक्तांस भूषण होईल.
परमेश्वराचें स्तवन करा.

१ परमेश्वराचें स्तवन करा.
१५० देवाचें त्याच्या पवित्रस्थानीं स्तवन करा;
त्याच्या सामर्थ्याच्या नभोमंडळांत
त्याचें स्तवन करा.

१ मुळांत : हालेलूया.

२ त्याच्या पराक्रमाच्या कृत्यांस्तव त्याचें स्तवन करा;
त्याच्या थोरवीच्या वैपुल्यानुसार त्याचें स्तवन करा.
३ करणा वाजवून त्याचें स्तवन करा.
सतार व वीणा वाजवून त्याचें स्तवन करा.
४ डफ वाजवून व नृत्य करून त्याचें स्तवन करा.
तंतुवाद्यें व बांसरी वाजवून त्याचें स्तवन करा.
५ खणखणणारे टाळ वाजवून त्याचें स्तवन करा.
झणझणणाऱ्या झांजा वाजवून त्याचें स्तवन करा.
६ प्रत्येक श्वासवान् प्राणी परमेशाचें
स्तवन करो.
परमेश्वराचें स्तवन करा.

१ मुळांत : हालेलूया.

# नीतिसूत्रें



१ इस्राएलाचा राजा दावीदपुत्र शलमोन
१ याचीं नीतिसूत्रें :
२ ज्ञान व शिक्षण हीं संपादण्यांत यावीं;
बोधमय वचनांचें परीक्षण करण्यांत यावें;
३ सुज्ञतेच्या व्यवहाराचें शिक्षण,
धर्म, नीति व सात्विकपण हीं प्राप्त करून घेण्यांत यावीं.
४ भोळ्यांस चातुर्य,
तरुणाला ज्ञान व चाणाक्षपण प्राप्त करून द्यावें;
५ ज्ञानी पुरुषानें ऐकावें, त्याचें ज्ञान वाढावें;
बुद्धिमानानें सुविचार प्राप्त करून घ्यावा;
६ बोधवचनें व दृष्टांत,
ज्ञानी लोकांच्या उक्ति व गूढवचनें समजावीं;
यांसाठीं हीं आहेत.

७ परमेश्वराचें भय हें ज्ञानाचा प्रारंभ होय,

१ अथवा : मुख्य भाग

पण मूर्ख लोक ज्ञान व शिक्षण तुच्छ मानितात.
८ माझ्या मुला, आपल्या बापाचा बोध ऐक,
आपल्या आईची शिस्त सोडूं नको;
९ कारण तीं तुझ्या शिराला भूषण,
व तुझ्या गळ्याला हार अशीं आहेत.
१० माझ्या मुला, पापी जन तुला भुलथाप देतील
तर तिला वश होऊं नको.
११ ते म्हणतील, आम्हांबरोबर ये,
आपण रक्तपात करण्यास टपून बसूं,
निर्दोषी मनुष्याकरितां निष्कारण लपून बसूं;
१२ त्यांस जीवंतपणींच अधोलोकाप्रमाणें गट्ट करूं,
गर्तेंत गडप होणाऱ्यांप्रमाणें सात्त्विकांस गिळून टाकूं;
१३ आपणांस सर्व प्रकारचे मोलवान् पदार्थ मिळतील,
आपलीं घरें लुटीनें भरूं;
१४ तूं आमचा भागीदार हो,
आपण सर्व एकच पिशवी बाळगूं;

१५ तर माझ्या मुला, त्यांच्या मार्गानें तूं जाऊं नको;
त्यांच्या वाटेंत आपलें पाऊल पडूं देऊं नको;
१६ कारण त्यांचे पाय दुष्कर्म करण्यास धावतात,
आणि रक्तपात करण्यास त्वरा करितात.
१७ एकाद्या पक्ष्याच्या डोळ्यांदेखत,
जाळें पसरणें व्यर्थ होय.
१८ ते आपल्या रक्तपातासाठीं टपतात,
ते आपल्याच प्राणघातासाठीं दडून बसतात.
१९ धनाचा लोभ धरणाऱ्या सर्वांची गति
अशीच आहे;
तें आपल्या मालकांचा जीव घेतें.

२० ज्ञान रस्त्यावर पुकारा करितें,
चवाठ्यांवर आपली वाणी उच्चारितें;
२१ गजबजलेल्या रस्त्यांच्या नाक्यांवर,
वेशींच्या दारांत, घोषणा करितें,
नगरांत आपले हे शब्द उच्चारितें:
२२ अहो भोळ्यांनो, तुमचें भोळेपण तुम्हांस
कोठवर आवडणार ?
धर्मनिंदा करणारे धर्मनिंदेंत कोठवर
आनंद पावणार,
आणि मूर्ख लोक ज्ञानाचा तिटकारा कोठवर करणार?
२३ माझा वाग्दंड ऐकून वळा;
पाहा, मी आपल्या आत्म्याचा वर्षाव तुम्हांवर करीन,
मी आपलीं वचनें तुम्हांस कळवीन.
२४ मीं हाक मारिली पण तुम्ही आलां नाहीं;
मीं आपला हात पुढें केला,
पण कोणीं लक्ष दिलें नाहीं;
२५ तुम्हीं माझ्या सर्व बोधाचा अव्हेर केला,
व माझा वाग्दंड मुळीं जुमानिला नाहीं;
२६ यास्तव तुमच्या विपत्कालीं मीहि हसेन;
तुमच्यावर संकट आलें असतां मी थट्टा करीन;
२७ वादळाप्रमाणें तुम्हांवर संकट येईल,
आणि तुफानाप्रमाणें तुम्हांस विपत्ति प्राप्त होईल;
विपत्ति व उद्वेग हीं तुम्हांवर ओढवतील.
२८ त्या समयीं ते मला हाक मारितील,
पण मी उत्तर देणार नाहीं;
ते मला आसक्तीनें शोधितील,
पण मी त्यांस सांपडणार नाहीं;
२९ कारण त्यांनीं ज्ञानाचा तिटकारा केला,
आणि परमेश्वराचें भय मान्य केलें नाहीं;
३० त्यांनीं माझ्या बोधाचा अव्हेर केला,
त्यांनीं माझा वाग्दंड तुच्छ लेखिला;
३१ म्हणून ते आपल्या वर्तनाचें फळ भोगितील,
आपल्या मसलतीचें भरपूर फळ भोगितील.
३२ कारण भोळ्यांचें भलतीकडे वळणें त्यांच्या नाशास
कारण होईल.
मूर्खांची भरभराट त्यांचा नाश करिते;
३३ पण जो माझें ऐकतो तो सुरक्षित राहतो,
आणि अरिष्टाची भीति नसल्यामुळें स्वस्थ असतो.

२ १ माझ्या मुला, जर तूं माझीं वचनें स्वीकारिशील,
माझ्या आज्ञा आपल्याजवळ
सांठवून ठेविशील,
२ आपला कान ज्ञानाकडे देशील,
आणि आपलें मन सुज्ञानाकडे लावशील;
३ जर तूं विवेकाला हाक मारिशील,
सुज्ञतेची आराधना करिशील;
४ जर तूं रुप्याप्रमाणें त्याचा शोध करिशील,
व गुप्त निधींप्रमाणें त्याला उमगून काढिशील;
५ तर परमेश्वराच्या भयाची तुला जाणीव होईल,
आणि देवाविषयींचें ज्ञान तुला प्राप्त होईल.
६ कारण ज्ञान परमेश्वर देतो;
त्याच्या मुखांतून ज्ञान व सुज्ञता येतात;
७ सरळांसाठीं तो यशःप्राप्ति सुलभ करितो;
सात्त्विकपणें चालणाऱ्यांस तो ढाल आहे;
८ अशासाठीं कीं त्यानें नीतिमार्गांचें रक्षण करावें,
आणि आपल्या भक्तांचा मार्ग संभाळावा.
९ धर्म, नीति व सात्विकता
अशा सर्व सन्मार्गांची तुला जाणीव घडेल.

१० कारण ज्ञान तुझ्या चित्तांत प्रवेश करील,
आणि विद्या तुझ्या जिवाला रम्य वाटेल;
११ विवेक तुझें रक्षण करील,
समजसपणा तुला संभाळील;
१२ म्हणजे कुमार्गापासून, विवेकशून्य गोष्टी
करणाऱ्या मनुष्यांपासून, तो तुला दूर ठेवील;
१३ ते सरळपणाचे मार्ग सोडून
अंधकाराच्या मार्गांनीं चालतात;
१४ त्यांला दुष्कर्म करण्यांत आनंद वाटतो,
दुष्कर्मांच्या कुटिलतेवरून ते उल्लास पावतात;
१५ त्यांचे मार्ग वाकडे आहेत,
त्यांच्या वाटा विपरीत आहेत.
१६ परस्त्रीपासून, मोहक भाषण करणाऱ्या परस्त्रीपासून,
ज्ञान तुझा बचाव करील;
१७ तिनें आपल्या तरुणपणाचा मित्र सोडिला आहे,
ती आपल्या देवाचा करार विसरली आहे;
१८ तिच्या घरांतून मृत्युमुखाकडे वाट आहे,
तिच्या वाटा मेलेल्यांकडे जातात;
१९ जे तिजकडे जातात त्यांतून कोणी परत येत नाहीं,
त्यांना जीवनाचे मार्ग साधत नाहींत;
२० यास्तव तूं भल्यांच्या मार्गानें चालावें
व धार्मिकांच्या रीतीचें अवलंबन करावें.
२१ कारण सरळ जनच देशांत वस्ती करितील;
सात्विक जन त्यांत राहतील.
२२ दुर्जनांचा देशांतून उच्छेद होईल,
अनाचाऱ्यांचें त्यांतून निर्मूलन होईल.

३ १ माझ्या मुला, माझें धर्मशास्त्र विसरूं नको;
तुझ्या चित्तांत माझ्या आज्ञा वागोत;
२ कारण त्यांपासून दीर्घ आयुष्य, वयोवृद्धि व
कल्याण हीं तुला प्राप्त होतील.
३ दया व सत्य हीं तुला न सोडोत;
त्यांची माळ तूं आपल्या गळ्यांत बांधीव;
त्यांस आपल्या हृत्पटावर लिहून ठेव;
४ म्हणजे तुला देव व मनुष्य यांजकडून,
अनुग्रह व सुकीर्ति हीं प्राप्त होतील.
५ तूं आपल्या अगदीं मनापासून परमेश्वरावर भाव ठेव,
आपल्याच बुद्धीवर अवलंबून राहूं नको;
६ तूं आपल्या सर्व मार्गांत त्याचा आदर कर,
म्हणजे तो तुझा मार्गदर्शक होईल.
७ तूं आपल्या दृष्टीनें स्वतःस शहाणा समजूं नको;
परमेश्वराचें भय धर आणि दुष्कर्मापासून दूर राहा.
८ हें तुझ्या देहाला आरोग्य
व हाडांना सत्व असें होईल.
९ तूं आपल्या द्रव्यानें व आपल्या सर्व उत्पन्नाच्या
प्रथम फळानें परमेश्वराचा सन्मान कर;
१० म्हणजे तुझीं कोठारें समृद्धीनें भरतील,
तुझीं कुंडें नव्या द्राक्षारसानें भरून वाहतील.

११ माझ्या मुला, परमेश्वराचें शिक्षण
तुच्छ मानूं नको
आणि त्याच्या शासनाला कंटाळूं नको;
१२ कारण जसा बाप आपल्या आवडत्या मुलाला,
तसा परमेश्वर ज्याच्यावर प्रीति करितो त्याला
शासन करितो.

१३ ज्याला ज्ञान प्राप्त होतें, जो सुज्ञता संपादन करितो,
तो मनुष्य धन्य होय.
१४ कारण त्याचा सौदा रुप्याच्या सौद्यापेक्षां,
व त्याचा लाभ उत्कृष्ट सोन्यापेक्षां उत्तम आहे.
१५ ज्ञान मोत्यांपेक्षां मौल्यवान् आहे;
आणि तुला कोणतीहि इष्ट वाटणारी वस्तु
त्याच्याशीं तुल्य नाहीं.
१६ त्याच्या उजव्या हातांत दीर्घ आयुष्य आहे;
त्याच्या डाव्या हातांत धन व गौरव हीं आहेत.
१७ त्याचे मार्ग आनंदाचे आहेत;
त्याच्या सर्व वाटा शांतिमय आहेत.
१८ जे त्याला धरून राहतात त्यांस तें
जीवनवृक्षरूप आहे;
जो कोणी तें राखून ठेवितो तो धन्य होय.
१९ परमेश्वरानें पृथ्वीचा पाया ज्ञानानें घातला;

त्यानें बुद्धीनें आकाश निर्माण केलें.
२० त्याच्या ज्ञानबलानें जलाशय बाहेर आले,
व आकाश दहिंवर वर्षतें.

२१ माझ्या मुला, तीं तुझ्या डोळ्यांआड
होऊं देऊं नको;
तूं चातुर्य व विवेक हीं संभाळून ठेव.
२२ म्हणजे तीं तुझ्या आत्म्याला जीवन
व तुझ्या कंठाला भूषण अशीं होतील.
२३ तेव्हां तूं आपल्या मार्गानें निर्भय चालशील,
तुझ्या पायाला ठोकर लागणार नाहीं.
२४ तूं निजतेवेळीं भिणार नाहींस;
तूं निजशील आणि तुझी झोप सुखाची होईल.
२५ तूं अकस्मात् आलेल्या धोक्याला भिऊं नको,
दुष्टांची धाड आली तरी भिऊं नको;
२६ कारण परमेश्वर तुझा रक्षणकर्ता होईल,
तो तुझा पाय गुंतूं देणार नाहीं.
२७ एखाद्याचें बरें करणें उचित असून तें करण्याचें
तुझ्या अंगीं सामर्थ्य असल्यास
तें करण्यास माघार घेऊं नको.
२८ एकादी वस्तु तुजजवळ असतां, आपल्या शेजाऱ्याला
असें सांगूं नको कीं
तूं जा आणि उद्यां परत ये,
म्हणजे ती मी तुला देईन.
२९ तुझा शेजारी तुजजवळ निर्भय राहतो असें पाहून
त्याचें वाईट योजूं नको.
३० एकाद्या मनुष्यानें तुझें वाईट केलें नसतां
त्याजशीं उगीच भांडण करूं नको.
३१ जुलूम करणाऱ्याची स्पर्धा करूं नको,
त्याची कोणतीहि रीत स्वीकारूं नको.
३२ कारण परमेश्वराला कुटिलाचा वीट आहे,
पण सरळांबरोबर त्याचें रहस्य आहे.
३३ परमेश्वराचा शाप दुर्जनांच्या घरावर असतो;
पण धार्मिकांच्या वस्तीला तो आशीर्वाद देतो.
३४ उपहास करणाऱ्यांचा तो अवश्य उपहास करितो,
पण दीनांवर तो कृपाप्रसाद करितो.
३५ ज्ञानी वैभवाचे वतनदार होतील,
पण मूर्ख लज्जेची बढती पावतील.

४

१ मुलांनो, बापाचें शिक्षण ऐका,
व सुज्ञता समजण्यासाठीं त्याकडे लक्ष द्या.
२ कारण मी तुम्हांस उत्तम धर्मोपदेश करितों;
माझें धर्मशास्त्र सोडूं नका.
३ कारण मी आपल्या बापाचा पुत्र होतों,
माझ्या आईच्या दृष्टीनें मी सुकुमार
व एकुलता एक होतों.
४ तो मला शिकवी व म्हणे,
माझीं वचनें तुझ्या चित्तीं राहोत;
तूं माझ्या आज्ञा पाळ व दीर्घायु हो;
५ ज्ञान संपादन कर, सुज्ञता संपादन कर;
तीं विसरूं नको, माझ्या तोंडच्या वचनांला
पराङ्मुख होऊं नको;
६ तें सोडूं नको म्हणजे तें तुझें संरक्षण करील;
त्याची आवड धर म्हणजे तें तुझा संभाळ करील.
७ ज्ञान ही श्रेष्ठ चीज आहे म्हणून तें संपादन कर;
आपली सर्व संपत्ति वेचून सुज्ञता संपादन कर.
८ त्याला उच्च पद दे म्हणजे तें तुझी उन्नति करील;
त्याला कवटाळून राहशील तर तें तुझें गौरव करील.
९ तें तुला शोभिवंत शिरोभूषण देईल;
तुला सुंदर मुकुट देईल.

१० माझ्या मुला, माझीं वचनें ऐकून घे,
म्हणजे तुझ्या आयुष्याची मर्यादा वृद्धिंगत होईल.
११ मीं तुला ज्ञानाचा मार्ग शिकविला आहे,
तुला सरलतेच्या वाटांनीं चालविलें आहे.
१२ तूं चालशील तेव्हां तुझीं पावलें अडखळणार नाहींत;
तूं धावशील तेव्हां तुला ठेच लागणार नाहीं.
१३ तूं शिक्षण दृढ धरून ठेव; सोडूं नको;
तें जवळ राख; कारण तें तुझें जीवन आहे.
१४ दुर्जनांच्या मार्गांत शिरूं नको;

दुष्टांच्या मार्गानें चालूं नको.
१५ त्यापासून दूर राहा, त्याजवळून जाऊं नको;
त्यावरून मागें फीर आणि आपल्या मार्गाला लाग.
१६ कारण दुष्कर्म केल्यावांचून त्यांना झोप येत नाहीं;
कोणाला पाडिलें नाहीं तर त्यांची झोप उडते.
१७ कारण ते दुष्टाईनें मिळविलेलें अन्न खातात,
बलात्कारानें मिळविलेला द्राक्षारस पितात;
१८ परंतु धार्मिकांचा मार्ग
मध्यान्हापर्यंत उत्तरोत्तर वाढणाऱ्या
उदयप्रकाशासारखा आहे.
१९ दुर्जनांचा मार्ग अंधकारासारखा आहे;
त्याला कशाची ठेच लागते हें त्यांस कळत नाहीं.

२० माझ्या मुला, माझ्या वचनांकडे लक्ष लाव;
माझ्या सांगण्याकडे कान दे.
२१ तीं तुझ्या डोळ्यांपुढून जाऊं देऊं नको;
तीं आपल्या अंतःकरणांत ठेव.
२२ कारण तीं ज्यांस लाभतात,
त्यांस तीं जीवन देतात आणि त्यांच्या सबंध
देहाला आरोग्य देतात.
२३ सर्व रक्षणीय वस्तूंपेक्षां आपल्या अंतःकरणाचें
विशेष रक्षण कर,
कारण त्यांत जीवनाचा उगम आहे.
२४ तूं उद्दामपणाचें भाषण करण्याचें सोडून दे,
कुटिल वाणीपासून फार दूर राहा.
२५ तुझे डोळे नीट पुढें पाहोत,
तुझ्या पापण्या तुझ्यापुढें सरळ राहोत.
२६ आपल्या पायांची वाट सपाट कर,
तुझे सर्व मार्ग निश्चित असोत.
२७ तूं डावीउजवीकडे वळूं नको;
दुष्कर्मातून आपलें पाऊल काढ.

५ १ माझ्या मुला, तूं विवेक राखावा
व तुझ्या वाणीनें ज्ञान जपून ठेवावें,
२ म्हणून तूं माझ्या ज्ञानशिक्षणाकडे लक्ष लाव,
माझ्या सुज्ञतेच्या बोधाकडे कान दे.
३ कारण परस्त्रीच्या ओठांतून मध स्रवतो,
तिचें तोंड तेलापेक्षां तुळतुळीत असतें;
४ तरी ती अखेरीस दवण्यासारखी कडू
व दुधारी तरवारीसारखी तीक्ष्ण होते.
५ तिचे पाय मृत्यूकडे खालीं जातात;
तिचीं पावलें अधोलोकास लागतात;
६ म्हणून तिला जीवनाची नीट वाट सांपडत नाहीं;
तिचे मार्ग डळमळीत आहेत, हें तिला कळत
नाहीं.
७ तर आतां मुलांनो, माझें ऐका,
माझ्या तोंडचीं वचनें सोडूं नका.
८ तिच्याकडची वाट सोडून दे,
तिच्या घराच्या दाराजवळ जाऊं नको;
९ गेलास तर तुझी अब्रू दुसऱ्यांच्या हातीं जाईल,
आणि तुझ्या आयुष्याचे दिवस निष्ठुरांच्या
हातीं जातील;
१० तुझ्या धनानें परके गबर होतील,
आणि तुझ्या श्रमाचें फळ दुसऱ्याच्या घरांत जाईल;
११ आणि परिणामीं तुझा देह व तुझी शक्ति क्षीण
झाल्यावर तूं शोक करिशील;
१२ आणि मग तूं येणेंप्रमाणें म्हणशील:
मीं शिक्षणाचा द्वेष कसा केला?
माझ्या अंतःकरणानें शासन कसें तुच्छ मानिलें?
१३ मीं आपल्या शिक्षकांची वाणी ऐकली नाहीं,
मला जे बोध करीत त्यांच्याकडे मीं कान दिला नाहीं.
१४ मंडळी व सभा यांच्यादेखत
मी बहुतेक दुष्कर्मांत गढलेला असें.
१५ तूं आपल्याच टाक्यांतलें पाणी पी,
आपल्या विहिरींतलें वाहतें पाणी पी.
१६ तुझे झरे बाहेर वाहून जावे काय?
तुझे जलाचे प्रवाह रस्त्यांवरून वाहावे काय?
१७ ते केवळ तुझ्यासाठीं असोत,
तुझ्याबरोबर दुसऱ्यांना त्यांचा उपयोग न घडो.
१८ तुझ्या झऱ्याला आशीर्वाद प्राप्त होवो;

तरुणपणीं केलेल्या स्त्रीसह संतुष्ट ऐस.
१९ रमणीय हरिणी, सुंदर रानशेळी
यांप्रमाणें तिचे स्तन तुला सर्वदा तृप्त राखोत,
तिच्या प्रेमानें तुझें चित्त मोहित होवो.
२० माझ्या मुला, परस्त्रीनें तुझें चित्त कां मोहित व्हावें ?
परक्या स्त्रीला तूं कां आलिंगन द्यावें ?
२१ मनुष्याचे मार्ग परमेश्वराच्या दृष्टीसमोर आहेत,
आणि तोच त्याच्या सर्व वाटा नीट करितो.
२२ दुर्जनाला त्याचीं स्वतांचींच दुष्कर्मे पछाडितात;
तो आपल्याच पापाच्या पाशांत सांपडतो.
२३ त्याला शिक्षण मिळालें नाहीं म्हणून तो मरतो;
तो आपल्या अति मूर्खपणामुळें भ्रांत होतो.

६ १ माझ्या मुला, जर तूं आपल्या शेजाऱ्याला
जामीन राहिलास,
परक्यासाठीं तूं हातावर हात दिला,
२ तर तूं आपल्या तोंडच्या वचनांत गुंतला आहेस;
तूं आपल्या तोंडच्या शब्दांनीं बद्ध झाला आहेस.
३ ह्याकरितां माझ्या मुला, तूं असें कर कीं आपणाला
मुक्त करून घे,
कारण तूं आपल्या शेजाऱ्याच्या हातीं
सांपडला आहेस;
तर जा, त्वरा कर; आपल्या शेजाऱ्याला अत्या-
ग्रहानें गळ घाल.
४ तूं आपल्या डोळ्यांस निद्रा लागूं देऊं नको,
आपल्या पापण्यांस झापड पडूं देऊं नको.
५ ज्याप्रमाणें पारध्याच्या हातून हरिणीला,
ज्याप्रमाणें फासेपारध्याच्या हातून पक्ष्याला,
त्याप्रमाणें आपणाला मुक्त करून घे.

६ अरे आळशा, मुंगीकडे जा;
तिचें वर्तन पाहून शहाणा हो;
७ तिला कोणी धनी,
देखरेख करणारा किंवा अधिपति नसतां
८ ती उन्हाळ्यांत आपलें अन्न मिळविते,
आणि कापणीच्या दिवसांत आपलें भक्ष्य जमा
करून ठेविते.
९ अरे आळशा, तूं किती वेळ निजशील ?
आपल्या झोपेंतून केव्हां उठशील ?
१० आणखी थोडीशी झोप घेतों, आणखी थोडीशी
डुकली खातों,
आणखी हात उराशीं धरून जरा निजतों,
११ असें म्हणत जाशील तर तुला दारिद्र्य
दरोडेखोराप्रमाणें,
आणि गरिबी तुला सशस्त्र मनुष्याप्रमाणें गांठील.

१२ अधम व दुर्जन मनुष्य
उद्दामपणाचें भाषण करीत जातो;
१३ डोळे मिचकावितो, पायांनीं इशारा करितो,
बोटांनीं खुणावितो;
१४ त्याच्या मनांत उद्दामपणा असतो;
तो दुष्कर्माची योजना करीत असतो;
तो वैमनस्य पसरितो.
१५ यामुळें त्याच्यावर विपत्ति अकस्मात् येईल;
त्याचा एकाएकीं चुराडा होईल,
त्याचा निभाव लागणार नाहीं.
१६ परमेश्वर ज्यांचा द्वेष करितो अशा सहा गोष्टी
आहेत;
नव्हे, त्याला अशा सात गोष्टींचा वीट आहे;
१७ उन्मत्त दृष्टि, लबाड बोलणारी जिव्हा,
निर्दोष रक्त पाडणारे हात,
१८ दुष्ट योजना करणारें अंतःकरण,
दुष्कर्म करण्यास त्वरेनें धावणारे पाय,
१९ लबाड बोलणारा खोटा साक्षी,
व भावाभावांत वैमनस्य उत्पन्न करणारा मनुष्य,
ह्या त्या होत.

२० माझ्या मुला, तूं आपल्या बापाची आज्ञा पाळ,
आपल्या आईची शिस्त सोडूं नको;
२१ ती नेहमीं आपल्या उराशीं कवटाळून धर,

ती आपल्या गळ्यांत बांधून ठेव.
२२ तूं चालशील तेव्हां ज्ञान तुला मार्ग दाखवील;
तूं निजशील तेव्हां तें तुझें रक्षण करील;
तूं जागा होशील तेव्हां तें तुजशीं बोलेल.
२३ कारण ती आज्ञा केवळ दिवा आहे
व ती शिस्त केवळ प्रकाश आहे;
बोधाचा वाग्दंड जीवनाचा मार्ग आहे;
२४ दुष्ट स्त्रीपासून, परस्त्रीच्या गोडबोल्या जिव्हेपासून,
तीं तुझें रक्षण करणारीं आहेत.
२५ तूं आपलें चित्त तिच्या सौंदर्यास पाहून लोलुप
होऊं देऊं नको;
तिच्या नेत्रकटाक्षांला वश होऊं नको.
२६ कारण व्यभिचारिणीच्या संगतीनें
मनुष्य भाकरीच्या तुकड्याला मोताद होतो;
स्वैरिणी स्त्री पुरुषाच्या अमोल जिवाची शिकार करिते.
२७ मनुष्यानें आपल्या उराशीं विस्तव धरिला
तर त्याचीं वस्त्रें जळणार नाहींत काय?
२८ कोणी निखाऱ्यावरून चालला
तर त्याचे पाय पोळणार नाहींत काय?
२९ जो कोणी आपल्या शेजाऱ्याच्या स्त्रीशीं गमन करतो
तो असा आहे;
जो कोणी तिला स्पर्श करितो तो निर्दोष
असणार नाहीं.
३० चोर भुकेला असल्यामुळें त्यानें आपला जीव
शांत करण्याकरितां चोरी केली,
तर त्याला लोक तुच्छ मानीत नाहींत;
३१ पण तो सांपडला तर सातपट परत देईल;
तो आपल्या घरची सर्व मत्ता देईल.
३२ स्त्रीशीं जारकर्म करणारा अक्कलशून्य आहे;
जो आपल्या जिवाचा नाश करून घेऊं पाहतो
तो असें करितो.
३३ त्याला घाय व अपकीर्ति हीं प्राप्त होतील;
त्याची निंदा कधीं पुसून जाणार नाहीं.
३४ कारण ईर्ष्या पुरुषास संतप्त करिते;
सूड उगविण्याच्या दिवशीं तो गय करणार नाहीं.
३५ तो कसल्याहि खंडणीची पर्वा करणार नाहीं;
त्याला तूं बहुत देणग्या दिल्या तरी त्याचें समा-
धान होणार नाहीं.

७ १ माझ्या मुला, माझीं वचनें राखून ठेव,
माझ्या आज्ञा आपल्याजवळ सांठवून ठेव.
२ माझ्या आज्ञा पाळ म्हणजे तूं वांचशील;
माझी शिस्त तूं आपल्या डोळ्यांतल्या बाहुली-
प्रमाणें सांभाळ.
३ तीं आपल्या बोटांस बांध;
तीं आपल्या हृत्पटावर लिहून ठेव.
४ तूं माझी बहीण आहेस असें ज्ञानाला म्हण;
आणि सुज्ञतेला आपली जिवलग मैत्रीण म्हण;
५ त्यांच्यायोगानें परस्त्रीपासून,
गोड भाषण करणाऱ्या परक्या स्त्रीपासून तुझें
रक्षण होईल.
६ मी आपल्या घराच्या खिडकीजवळील
जाळींतून बाहेर पाहिलें तों,
७ भोळ्या मंडळींत, तरुण जनांमध्यें
एक बुद्धिहीन तरुण पुरुष
माझ्या दृष्टीस पडला.
८ तो तिच्या घराच्या कोनाजवळून जाणाऱ्या
आळींतून फिरत होता;
तो तिच्या घराकडच्या वाटेनें,
९ संध्याकाळीं, दिवस मावळतां,
रात्रीच्या काळोखांत, निबिड अंधकारांत गेला.
१० तेव्हां वेश्येचा पोशाख केलेली
कोणी एक कावेबाज स्त्री त्याला भेटली.
११ ती वाचाळ व स्वच्छंदी असून
तिचे पाय घरीं टिकत नाहींत;
१२ कधीं रस्त्यांवर, कधीं चवाठ्यांवर,
कधीं प्रत्येक नाक्याजवळ ती टपत असते.
१३ तिनें त्याला धरून त्याचें चुंबन घेतलें;
तिनें निर्लज्ज मुखानें त्याला म्हटलें,
१४ मला शांत्यर्पणें करावयाचीं होतीं;

मी आपले नवस आज फेडून चुकलें.
१५ ह्याकरितां तुला भेटावयाला व तुझें मुख पाहावयाला,
मी बाहेर आलें आहें आणि तूं मला सांपडला आहेस.
१६ मीं आपला पलंग वेलबुटीदार गिरद्यांनीं,
मिसरी तागाच्या पट्टेदार वस्त्रांनीं सजविला आहे.
१७ मीं आपली गादी बोळ, अगरू व दालचिनी,
यांनीं सुवासिक केली आहे.
१८ ये, चल, आपण सकाळपर्यंत प्रीतीनें रमून तृप्त होऊं;
आपण प्रेमानंदानें आराम पावूं.
१९ कारण घरधनी घरीं नाहीं,
तो दूरच्या प्रवासाला गेला आहे;
२० त्यानें पैशांची पिशवी बरोबर नेली आहे;
तो पौर्णिमेस घरीं येईल.
२१ तिनें आपल्या पुष्कळ मोहक भाषणानें त्याला
वश केलें,
आपल्या वाणीच्या माधुर्यानें त्याला आकर्षून घेतलें.
२२ तो तत्काळ तिच्या मागें चालला,
जसा बैल कापला जाण्यास जातो,
जसा बेडी घातलेला मूर्ख शिक्षा भोगण्यास जातो,
२३ जसा पक्षी, पाश आपला जीव घेण्याकरितां आहे
हें न जाणून त्याकडे धाव घेतो,
तसा तो जातो;
पण अखेरीस तीर त्याचें काळीज भेदून जातो.
२४ तर माझ्या मुलांनो, माझें ऐका,
माझ्या तोंडच्या वचनांकडे लक्ष द्या.
२५ तुझ्या मनाला तिच्या मार्गांकडे वळूं देऊं नको,
तिच्या वाटांनीं जाऊन बहकूं नको.
२६ कारण तिनें बहुतांना घायाळ करून पाडिलें आहे;
तिनें वधिलेल्या सर्वांची संख्या फार मोठी आहे.
२७ तिचें घर म्हटलें म्हणजे अधोलोकाकडे, मृत्यूच्या
खोल्यांकडे,
खालीं उतरण्याचा मार्ग होय.

८ १ ज्ञान घोषणा करीत नाहीं काय ?
सुज्ञपण आपल्या वाणीची गर्जना करीत
नाहीं काय ?
२ मार्गावरील उंचवट्यांच्या शिखरांवर,
चवाठ्यांवर तें उभें असतें;
३ तें वेशींनजीक, नगराच्या तोंडीं,
प्रवेशद्वारीं मोठ्यानें ओरडून म्हणतें,
४ मानवहो, मी तुम्हांला हाका मारीत आहें;
मनुष्यजातीसाठीं माझी वाणी आहे.
५ अहो भोळ्यांनो, तुम्ही चातुर्याची ओळख करून घ्या;
मूर्खांनो, सुबुद्ध हृदयाचे व्हा.
६ ऐका, कारण मी उत्कृष्ट गोष्टी सांगणार आहें.
माझ्या वाणींतून सरळ गोष्टी निघणार आहेत.
७ माझें तोंड सत्य बोलतें;
माझ्या वाणीला दुष्टपणाचा वीट आहे.
८ माझ्या तोंडचीं सर्व वचनें न्यायाचीं आहेत;
त्यांत कांहीं वांकडें व विपरीत नाहीं.
९ ज्याला समजूत आहे त्याला तीं सर्व उघड आहेत,
तीं ज्ञान प्राप्त झालेल्यांस सरळ आहेत.
१० रुपें घेऊं नका तर माझें शिक्षण घ्या;
उत्कृष्ट सोनें न घेतां ज्ञान घ्या.
११ कारण मोत्यांपेक्षां ज्ञान उत्तम आहे;
सर्व इष्ट वाटणाऱ्या वस्तु त्याच्याशीं तुल्य नाहींत.
१२ मी जें ज्ञान त्या माझी वस्ती चातुर्याबरोबर आहे;
आणि विद्या व विवेक हीं मीं प्राप्त करून
घेतलीं आहेत.
१३ परमेश्वराचें भय धरणें म्हणजे दुष्कर्मांचा द्वेष
करणें होय;
गर्व, अभिमान, कुमार्ग व उद्दामपणाची वाणी
यांचा मी द्वेष करितें.
१४ मसलत व कार्यसिद्धि हीं माझीं आहेत;
मी सुज्ञतामय आहें; मला सामर्थ्य आहे.
१५ माझ्या साहाय्यानें राजे राज्य करितात,
अधिपति न्याय ठरवितात.
१६ माझ्या साहाय्यानें अधिपति, सरदार,
व पृथ्वीवरील सर्व न्यायाधीश अधिकार चालवितात.
१७ मजवर जे प्रीति करितात त्यांजवर
मी प्रीति करितें;
जे मला परिश्रमानें शोधितात त्यांस मी सांपडतें.

१८ संपत्ति व मान, टिकणारें धन व न्याय,
हीं माझ्या हातीं आहेत.
१९ माझें फळ सोन्यापेक्षां,
शुद्ध सोन्यापेक्षां उत्तम आहे;
माझी प्राप्ति उत्कृष्ट रुप्यापेक्षां उत्तम आहे.
२० मी नीतिमार्गानें,
न्यायाच्या वाटांनीं चालतें;
२१ मजवर प्रीति करणाऱ्यांस मी संपत्ति प्राप्त
करून देतें,
त्यांचीं भांडारें भरितें.
२२ परमेश्वरानें सृष्टिक्रमाच्या आरंभीं आपल्या प्राचीन
कृत्यांतील पहिलें कृत्य,
असें मला पैदा केलें.
२३ अनादिकालीं, प्रारंभापासून
पृथ्वीच्या पूर्वी माझी स्थापना झाली.
२४ जलाशय नव्हते, पाण्यानें भरलेले झरे नव्हते,
तेव्हां मी जन्म पावलें.
२५ पर्वत स्थापित झाल्यापूर्वी,
डोंगरांपूर्वी, मला निर्माण केलें;
२६ त्या वेळापर्यंत त्यानें पृथ्वी, शेतें व पृथ्वीचा
धूलिसंचय हीं निर्माण केलीं नव्हतीं.
२७ त्यानें आकाश स्थापिलें तेव्हां मी होतें;
जेव्हां त्यानें जलाशयाची चक्राकार मर्यादा ठरविली;
२८ जेव्हां त्यानें वरतीं अंतराळ दृढ केलें;
जेव्हां जलाशयाचे झरे जोरानें वाहूं लागले;
२९ जलांनीं त्याची आज्ञा उल्लंघूं नये
म्हणून जेव्हां त्यानें समुद्राला मर्यादा घालून दिली;
जेव्हां त्यानें पृथ्वीचे पाये रेखिले;
३० तेव्हां मी त्याच्यापाशीं कुशल कारागीर होतें;
मी त्याला नित्य आनंददायी होतें;
त्याच्यासमोर मी सर्वदा हर्ष पावत असें;
३१ त्याच्या पृथ्वीवर मी हर्ष करीं;
मनुष्यजातीच्या ठायीं मी आनंद पावें.
३२ तर आतां माझ्या मुलांनो, माझें ऐका;
जे माझ्या मार्गांनीं चालतात ते धन्य होत;
३३ बोध ऐकून शहाणे व्हा,
त्याचा अव्हेर करूं नका.
३४ जो माझ्या दारांशीं नित्य जागत राहून,
माझ्या दारांच्या खांबांजवळ उभा राहून माझें
ऐकतो तो धन्य.
३५ कारण ज्याला मी प्राप्त होतें,
त्याला जीवन प्राप्त होतें,
आणि त्याला परमेश्वराची दया प्राप्त होते;
३६ परंतु जो मला अंतरतो तो आपल्या जिवाची हानि
करून घेतो;
जे माझा द्वेष करितात त्या सर्वांला मरण प्रिय आहे.

९ १ ज्ञानानें आपलें घर बांधिलें आहे;
त्यानें आपले सात खांब तयार केले आहेत.
२ त्यानें आपले पशु कापिले आहेत;
त्यानें आपला द्राक्षारस मिसळला आहे,
आपलें मेजहि वाढून तयार केलें आहे.
३ त्यानें आपल्या दासी पाठविल्या आहेत,
तें नगराच्या उच्च स्थानांवरून ओरडून म्हणतें,
४ जो कोणी भोळा आहे तो इकडे वळो;
जो बुद्धिहीन आहे त्याला तें म्हणतें,
५ ये, माझी भाकर खा;
आणि मीं मिसळलेला द्राक्षारस पी.
६ भोळ्यांनो, तुम्ही आपलें भोळेपण सोडा व वांचा;
आणि सुज्ञतेच्या मार्गानें चाला.

७ जो धर्मनिंदकास वाग्दंड करितो तो आपली
अप्रतिष्ठा करून घेतो;
जो दुर्जनाला बोल लावितो,
तो आपणाला कलंक लावून घेतो.
८ धर्मनिंदकाला बोल लावूं नको, लाविशील तर तो
तुझा द्वेष करील;
ज्ञान्याला बोल लाव म्हणजे तूं त्याला
प्रिय होशील.
९ ज्ञान्याला बोध केला तर तो अधिक ज्ञानी होईल;

धार्मिकाला बोध केला तर त्याचें ज्ञान वाढेल.
१० परमेश्वराचें भय ज्ञानाचा आरंभ होय;
आणि परमपवित्राला ओळखणें हीच सुज्ञता होय.
११ कारण माझ्यामुळें तुझे दिवस बहुगुणित होतील,
तुझीं आयुष्याचीं वर्षे अधिक होतील.
१२ तूं ज्ञानी असलास तर तें तुझें तुला;
तूं धर्मनिंदा केली तर त्याचें फळ तूंच भोगिशील.

१३ मूर्ख स्त्री गडबड करणारी असते;
ती भोळेपणाची केवळ मूर्ति असून तिला कांहीं कळत नाहीं.
१४ ती नगराच्या उच्च स्थानीं
आपल्या घराच्या दाराजवळ
आसनावर बसून राहते;
१५ आणि कोणी आपल्या वाटेनें नीट जाणारा
तिच्याजवळून जाऊं लागला म्हणजे
१६ ती म्हणते, जो कोणी भोळा आहे तो इकडे वळो;
जो कोणी बुद्धिहीन असतो त्याला ती म्हणते,
१७ चोरिलेलें पाणी गोड लागतें;
चोरून खाल्लेली भाकर रुचकर लागते;
१८ पण तेथें मेलेले आहेत,
तिचे आमंत्रित अधोलोकाच्या खोल स्थानीं आहेत,
हें त्याला समजत नाहीं;

१० १ शलमोनाचीं नीतिसूत्रें :

मुलगा शहाणा तर बाप सुखी,
मुलगा मूर्ख तर आई दुःखी.
२ दुष्टाईनें मिळविलेली संपत्ति हितकर नाहीं,
पण धार्मिकता मरणापासून मुक्त करिते.
३ परमेश्वर धार्मिकाच्या जीवाची उपासमार होऊं देत नाहीं,
पण तो दुर्जनांच्या कामना व्यर्थ करितो.
४ सैल हातानें काम करणारा दरिद्री होतो,
परंतु उद्योग्याचा हात धन मिळवितो.
५ उन्हाळ्यांत जमवाजमव करितो तो मुलगा शहाणा होय;
जो मुलगा हंगामाच्या वेळीं झोपेंत गुंग असतो
त्याचें तें वागणें लज्जास्पद होय.
६ धार्मिकाच्या मस्तकीं आशीर्वाद असतात;
दुर्जनांचें मुख बलात्कारानें व्याप्त असतें.
७ धार्मिकाच्या स्मरणानें धन्यता वाटते;
दुर्जनांचें नांव वाईट होऊन जातें.
८ सुज्ञ मनाचा इसम आज्ञा मान्य करितो;
वाचाळ मूर्ख अधःपात पावतो.
९ सात्विकपणें चालणारा निर्भयपणें चालतो;
कुटिल मार्गांनीं चालणारा कळून येईल.
१० जो डोळे मिचकावितो तो दुःखास कारण होतो;
वाचाळ मूर्ख अधःपात पावतो.
११ धार्मिकाचें मुख जीवनाचा झरा आहे;
दुर्जनांचें मुख बलात्कारानें व्याप्त असतें.
१२ द्वेष कलह उत्पन्न करितो;
प्रीति सर्व अपराधांवर झाकण घालिते.
१३ विवेकशीलाच्या वाणींत ज्ञान असतें,
पण जो अक्कलशून्य असतो त्याच्या पाठीस काठीच योग्य आहे.
१४ शहाणे जन ज्ञानसंग्रह करितात,
परंतु मूर्खाचें तोंड म्हटलें म्हणजे साक्षात् अरिष्ट होय.
१५ धनवानाचें धन हें त्याचें बळकट नगर होय,
परंतु गरिबांचा नाश त्यांच्या दारिद्र्यांत आहे.
१६ धार्मिकाचा उद्योग जीवनप्रद आहे.
दुर्जनाची समृद्धि पापाला कारण होते.
१७ बोधाकडे लक्ष पुरविणारा जीवनाच्या मार्गांत असतो,
परंतु शिक्षण सोडणारा भ्रांत होतो.
१८ गुप्तपणें द्वेष करणाऱ्याची वाणी असत्य असते,
आणि चहाडी करणारा मूर्ख असतो.
१९ फार वाचाळता असली म्हणजे पापाला तोटा नाहीं,
पण जो आपली वाणी स्वाधीन ठेवितो तो शहाणा.
२० धार्मिकाची जिव्हा उत्कृष्ट रुप्यासारखी आहे;
दुर्जनांचें हृदय कवडीमोल आहे.

२१ धार्मिकाची वाणी बहुतांचें पोषण करिते,
परंतु मूर्ख अक्कल नसल्यामुळें मरतात,
२२ परमेश्वराचा आशीर्वाद समृद्धि देतो,
तिच्याबरोबर तो आणखी कष्ट देत नाहीं.
२३ मूर्खाला दुष्कर्म करण्यांत मौज वाटते,
तशी सुज्ञाला ज्ञानांत वाटते.
२४ दुर्जन ज्याला भितो तें त्याजवर येईल,
आणि धार्मिकांची इच्छा पूर्ण होते.
२५ वावटळीच्या सपाट्यानें दुर्जन नाहींसा होतो,
पण धार्मिक सर्वकाळ टिकणाऱ्या पायासारखा आहे.
२६ जशी आंब दांतांस, जसा धूर डोळ्यांस,
तसा सुस्त मनुष्य त्याला पाठविणाऱ्यांस आहे.
२७ परमेश्वराचें भय आयुष्य वाढवितें,
पण दुर्जनांचीं वर्षें कमी होतात.
२८ धार्मिकांची आशा आनंदप्रद होईल,
पण दुर्जनांची अपेक्षा नष्ट होईल.
२९ परमेश्वराचा मार्ग सात्विकाला दुर्गरूप आहे,
पण दुष्कर्म करणाऱ्यांस तो नाशकारक आहे,
३० धार्मिक कधींहि ढळणार नाहीं,
पण दुर्जन देशांत वसणार नाहींत.
३१ धार्मिकाच्या मुखावाटे ज्ञान निघतें,
पण उन्मत्त जिव्हा छाटली जाईल.
३२ धार्मिकाच्या वाणीला जें कांहीं ग्राह्य आहे तेंच कळतें,
पण दुर्जनांचें मुख उन्मत्तपणा वदतें.

## ११

१ खोट्या तागडीचा परमेश्वराला वीट आहे,
पण खरें वजन त्याला प्रिय आहे.
२ गर्व झाला कीं अप्रतिष्ठा आलीच,
पण नम्रजनांच्या ठायीं ज्ञान असतें.
३ सरळांचा सात्विकपणा त्यांला संभाळून नेतो,
कपटी इसमांचा कुटिलपणा त्यांचा नाश करितो.
४ क्रोधाच्या समयीं धन उपयोगीं पडत नाहीं,
पण धार्मिकता मृत्यूपासून सोडविते.
५ सात्विकाची धार्मिकता त्याचा मार्ग नीट करिते,
पण दुर्जन आपल्या दुष्टतेनें पतन पावेल.
६ सरळांची धार्मिकता त्यांला सोडवील,
पण जे कपटानें वर्ततात ते आपल्या दुष्कृतीनेंच
बद्ध होतील.
७ दुर्जन मेला म्हणजे त्याची अपेक्षा नष्ट होईल
आणि बलाविषयींचा भरंवसा नाहींसा होईल.
८ धार्मिक संकटांतून मुक्त होतो,
आणि त्याच्या जागीं दुर्जन सांपडतो.
९ अधर्मी आपल्या तोंडानें आपल्या शेजाऱ्याचा
नाश करितो,
पण धार्मिक आपल्या ज्ञानानें मुक्त होतात.
१० धार्मिकांचें कुशल असतें तेव्हां नगर उल्लास पावतें;
दुर्जन नाश पावतात तेव्हां उत्साह होतो.
११ सरळांच्या आशीर्वादानें नगराची उन्नति होते,
पण दुर्जनांच्या मुखानें त्याचा विध्वंस होतो.
१२ जो आपल्या शेजाऱ्याला तुच्छ मानितो तो
बुद्धिशून्य होय,
पण सुज्ञ मनुष्य मौन धारण करितो.
१३ लावालावी करीत फिरणारा गुप्त गोष्टी उघड करितो,
पण ज्याच्या चित्तीं इमान वसतें तो गोष्ट गुप्त ठेवितो.
१४ शहाणा मार्गदर्शक नसल्यामुळें लोकांचा
अधःपात होतो,
पण सुमंत्री बहुत असले म्हणजे कल्याण होतें.
१५ परक्याला जामीन राहील तो पस्तावेल,
पण हातावर हात देणारांचा ज्याला तिटकारा आहे
तो निर्भय राहतो.
१६ कृपाळू स्त्री सन्मान संपादिते,
आणि बलात्कारी इसम धन संपादितात.
१७ दयाळू मनुष्य आपल्या जिवाचें हित करितो,
पण निर्दय स्वतांवर संकट आणितो.
१८ दुर्जन वेतन मिळवितो तें बेभरवशाचें असतें;
परंतु जो नीतीचें बीजारोपण करितो त्याचें वेतन
खात्रीचें असतें.
१९ ज्याच्या ठायीं अढळ नीति असते त्याला जीवन
प्राप्त होतें;
जो दुष्कर्मामागें लागतो तो आपणावर मृत्यु आणितो.
२० जे मनाचे कुटिल असतात त्यांचा परमेश्वराला
वीट आहे,

पण ज्यांचा मार्ग सात्विकतेचा आहे
त्यांबद्दल त्यास आनंद वाटतो.
२१ दुर्जनाला शिक्षा चुकणार नाहीं हें मी
टाळी देऊन सांगतों,
पण धार्मिकांच्या वंशजांची मुक्तता होईल.
२२ डुकराच्या नाकांत जशी सोन्याची नथ,
तशी तारतम्य नसलेली सुंदर स्त्री समजावी.
२३ धार्मिकांची इच्छा शुभच असते;
दुर्जनांची अपेक्षा रोषरूप आहे.
२४ एक इसम व्यय करितो तरी त्याची वृद्धिच होते,
एक वाजवीपेक्षां फाजील काटकसर करितो,
तरी तो भिकेस लागतो.
२५ उदार मनाचा समृद्ध होतो;
जो पाणी पाजितो त्याला स्वतांला तें पाजण्यांत येईल.
२६ जो धान्य अडवून ठेवितो त्याला लोक शाप देतात;
जो तें विकितो त्याच्या मस्तकीं आशीर्वाद येईल.
२७ जो झटून हित साधूं पाहतो तो कृपाप्रसाद साधितो;
जो अरिष्टाच्या शोधांत असतो त्याला
तेंच प्राप्त होईल.
२८ जो आपल्या धनावर भरवसा ठेवितो तो पडेल,
पण धार्मिक नव्या पालवीप्रमाणें टवटवीत होतील.
२९ जो घरच्यांस दुःख देतो त्याच्या वांट्याला वारा येईल;
मूर्ख मनुष्य शहाण्याचा चाकर होईल.
३० धार्मिकाचें फळ जीवनाचा वृक्ष होय,
आणि जो ज्ञानी असतो तो जिवांस वश करितो.
३१ पाहा, धार्मिकाला पृथ्वीवर त्याच्या कर्माचें
फळ मिळतें.
तर मग दुर्जनाला व पातक्याला किती तरी जास्त
मिळेल !

१२

१ ज्याला ज्ञान प्रिय, त्याला शिक्षण प्रिय;
पण जो वाग्दंड तुच्छ लेखितो
तो पशुतुल्य होय.
२ सज्जनाला परमेश्वराचा प्रसाद घडतो,
परंतु दुष्टपणाच्या युक्ति योजणाऱ्याला
तो दोषी ठरवितो.
३ मनुष्य दुष्टतेनें स्थिर होत नाहीं,
पण धार्मिकांचें मूळ ढळत नाहीं.
४ सद्गुणी स्त्री आपल्या पतीला मुकुट आहे,
पण लाज आणणारी स्त्री त्याचीं हाडें
सडविणारी आहे.
५ धार्मिकांचे विचार यथान्याय असतात;
दुर्जनांच्या मसलती कपटाच्या असतात.
६ दुर्जनांचें भाषण रक्तपातासाठीं टपून बसलेलें असतें,
पण सरळांचें मुख त्यांस सोडवील.
७ दुर्जन उलथे पडून नष्ट होतात,
परंतु धार्मिकांचें घर टिकतें.
८ मनुष्याची प्रशंसा त्याच्या सुज्ञतेप्रमाणें होते,
पण ज्याचें हृदय कुटिल असतें त्याचा तिरस्कार होतो.
९ जो आपणास प्रतिष्ठित समजतो पण अन्नाला
मोताद असतो
त्यापेक्षां ज्याची प्रतिष्ठा बेताची असून ज्याच्या
पदरीं सेवक असतो तो चांगला समजावयाचा.
१० धार्मिक मनुष्य आपल्या पशूच्या जिवाकडे लक्ष देतो :
पण दुर्जनांचें अंतर्याम क्रूर असतें.
११ जो आपलें शेत स्वतः करितो त्याला भरपूर
अन्न मिळतें,
परंतु जो निरर्थक गोष्टींमागें लागतो तो अक्कल-
शून्य होय.
१२ दुष्ट लोकांस मिळणाऱ्या लुटीची इच्छा दुर्जन करितो,
परंतु धार्मिकांचें मूळ फळ देतें.
१३ मुखांतील वाणीचा अपराध दुर्जनाला पाश आहे,
परंतु धार्मिक संकटांतून निभावतो.
१४ आपल्या मुखांतून निघालेल्या गोष्टींच्या योगें
मनुष्य तृप्त होतो,
आणि मनुष्याला आपल्या हातच्या कर्माचें
प्रतिफल मिळतें.
१५ मूर्खाचा मार्ग त्याच्या दृष्टीनें नीट आहे,
पण जो सुज्ञ असतो तो उपदेश ऐकतो.
१६ मूर्खाची तळमळ तत्काळ कळते;
शहाणा आपली लाज झांकून ठेवितो.

१७ ज्याच्या तोंडून सत्याचे उद्गार श्वासाप्रमाणें बाहेर
पडतात तो न्याय्यत्व प्रकट करितो,
परंतु असत्य साक्षी कपट उचारितो.
१८ कोणी असा असतो कीं तरवार भोसकावी तसें
अविचाराचें भाषण करितो,
परंतु सुज्ञांची जिव्हा आरोग्यदायी आहे.
१९ सत्याची वाणी सर्वकाळ टिकेल;
असत्य बोलणारी जिव्हा केवळ क्षणिक आहे.
२० वाईट योजणाऱ्यांच्या अंतःकरणांत कपट असतें,
परंतु शांतीची मसलत देणाऱ्यांच्या मनांत
हर्ष असतो.
२१ धार्मिकाला विपत्ति येत नाहीं,
पण दुर्जन अरिष्टांनीं व्याप्त होतील.
२२ असत्य वाणी परमेश्वराला वीट आणिते,
परंतु सत्यानें वागणारे त्यास आनंद देतात.
२३ शहाणा मनुष्य ज्ञान लपवून ठेवितो;
परंतु मूर्खांचें मन मूर्खपणाचा पुकारा करितें.
२४ उद्योग्यांच्या हातीं अधिकार येतो,
पण जे आळशी आहेत त्यांना दास्य प्राप्त होतें.
२५ मनुष्याचें मन चिंतेनें दबून जातें,
परंतु गोड शब्द त्याला आनंदित करितो.
२६ धार्मिक आपल्या शेजाऱ्याला मार्ग दाखवितो,
पण दुर्जनांचा मार्ग लोकांस बहकवितो.
२७ आळस हा आपली शिकार धरीत नाहीं,
पण उद्योग हा मनुष्याचें मोलवान् धन आहे.
२८ न्याय्यत्वाच्या मार्गांत जीवन आहे;
त्याच्या वाटेंत मरण नाहीं.

१३

१ सुज्ञ पुत्र बापाचें शिक्षण ऐकतो,
पण धर्मनिंदक वाग्दंडाला मोजीत नाहीं.
२ तोंडच्या शब्दांनीं मनुष्य स्वतः चांगलें
फळ भोगितो,
पण कपटी इसमांच्या जिवाला बलात्काररूप
फळ मिळतें;
३ जो आपलें तोंड संभाळितो तो आपला जीव राखितो;
जो आपलें तोंड वासतो त्याच्यावर अरिष्ट येतें;
४ आळशाच्या जिवाला हांव असते तरी त्याला कांहीं
मिळत नाहीं;
उद्योग्यांचा जीव पुष्ट होतो.
५ धार्मिकाला असत्याचा तिटकारा असतो,
परंतु दुर्जन अप्रतिष्ठा व निंदा यांस कारण होतो.
६ धार्मिकता सात्विक मार्गानें चालणाऱ्यांचें
रक्षण करिते;
दुष्टता पातक्यांस उताणा पाडिते.
७ कित्येक असे आहेत कीं ते श्रीमंतीचा आव घालि-
तात तरी त्यांच्याजवळ कांहींएक नसतें;
कित्येक असे आहेत कीं ते गरिबी दाखवितात
तरी त्यांच्यापाशीं बहुत धन असतें.
८ मनुष्याच्या जिवाची खंडणी त्याचें द्रव्य होय,
परंतु दरिद्र्याला धमकी ऐकावी लागत नाहीं.
९ धार्मिकांची ज्योति प्रज्वलित असते;
दुर्जनांचा दीप मालवतो.
१० गर्वामुळें भांडणें मात्र होतात,
पण चांगली मसलत घेणाऱ्यांजवळ ज्ञान असतें.
११ धाईनें मिळविलेलें धन क्षय पावतें.
परंतु जो मूठ मूठ सांठवितो त्याचें धन वृद्धि पावतें.
१२ आशा लांबणीवर पडली असतां अंतःकरण कष्टी होतें,
पण इष्टप्राप्ति जीवनाचा वृक्ष आहे.
१३ वचन तुच्छ मानणारा स्वतांवर अनर्थ आणितो,
पण आज्ञेचा धाक बाळगणाऱ्यास
चांगलें प्रतिफल मिळतें.
१४ सुज्ञाचा बोध जीवनाचा झरा आहे,
तो मृत्युपाश चुकवितो.
१५ समंजसपणानें कृपा संपादितां येते,
पण कपटी इसमांचा मार्ग खडतर असतो.
१६ प्रत्येक शहाणा मनुष्य अकलेनें काम करितो,
पण मूर्ख मनुष्य मूर्खतेचा पसारा मांडितो.
१७ दुष्ट जासूद संकटांत पडतो; पण विश्वासू वकील हा एक
औषधी आहे.
१८ बोधाचा अव्हेर करणाऱ्याला दारिद्र्य व लज्जा हीं
प्राप्त होतात,

परंतु वाग्दंड ऐकणारा सन्मान पावतो.
१९ इच्छातृप्ति जिवाला गोड वाटते,
पण वाईट सोडून देण्याचा मूर्खाला वीट आहे.
२० सुज्ञांची सोबत धर म्हणजे सुज्ञ होशील;
मूर्खांचा सोबती कष्ट पावतो.
२१ पाप्यांच्या पाठीस अरिष्ट लागतें,
पण धार्मिकांस कल्याणरूप प्रतिफल मिळतें.
२२ चांगला मनुष्य आपल्या पुत्रपौत्रांस वतन ठेवितो,
पण पाप्याचें धन धार्मिकासाठीं सांठविलेलें असतें.
२३ गरिबांचें नांगरलेलें शेत विपुल अन्न देतें;
तरी अन्यायामुळें कित्येकांचा
नाशहि होतो.
२४ जो आपली छडी आवरितो तो आपल्या मुलाचा
वैरी होय,
पण जो वेळींच त्याला शिक्षा करितो तो त्याजवर
प्रीति करणारा होय.
२५ धार्मिक पोटभर जेवितो,
परंतु दुर्जनांचें पोट रितें राहतें.

१४ १ प्रत्येक सुज्ञ स्त्री आपलें घर बांधिते;
पण मूर्ख स्त्री आपल्या हातांनीं
तें पाडून टाकिते.
२ जो सरळपणें चालतो तो परमेश्वराचें भय धरितो,
पण ज्याचे मार्ग कुटिल असतात
तो त्याला तुच्छ मानितो.
३ मूर्खाच्या तोंडींच गर्वाची काठी असते,
पण सुज्ञांची वाणी त्यांचें रक्षण करिते.
४ बैल नसले तर गोठा स्वच्छ राहतो,
पण बैलाच्या बलानें धनसमृद्धि होते.
५ विश्वासू साक्षी खोटें बोलत नाहीं;
खोटा साक्षी मुखानें असत्य वदतो.
६ धर्मनिंदक ज्ञानाचा शोध करितो, पण व्यर्थ;
समंजसाला ज्ञानप्राप्ति होणें सोपें असतें.
७ मूर्ख मनुष्याच्या वाऱ्यास जाऊं नको,
कारण त्याच्या ठायीं तुला ज्ञानाची वाणी
आढळणार नाहीं.
८ शहाण्यानें आपला मार्ग जाणणें यांत
त्याची सुज्ञता असते,
पण मूढांची मूढता कपटरूप होय.
९ मूर्खाला अपराध करणें म्हणजे थट्टा वाटते,
परंतु सरळांत परस्पर प्रेमभाव असतो.
१० हृदयाला आपल्या ठायींच्या खेदाची जाणीव असते,
आणि परक्याला त्याच्या आनंदाच्या आड
येववत नाहीं.
११ दुर्जनांचें घर कोसळतें,
सरळांचा तंबू चांगला राहतो.
१२ मनुष्याला एक मार्ग सरळ दिसतो,
पण त्याच्या शेवटास मृत्युपथ फुटतात.
१३ हसतांना देखील हृदय खिन्न असतें,
आणि हर्षाचा शेवट दुःखांत होतो.
१४ भ्रांत चित्ताचा मनुष्य आपल्या वर्तनाचें
फळ भोगितो,
आणि सत्पुरुष आपल्या ठायीं तृप्त असतो.
१५ भोळा प्रत्येक शब्दावर विश्वास ठेवितो;
शहाणा नीट पाहून पाऊल टाकितो.
१६ सुज्ञ धाक बाळगून वाईट सोडून देतो;
मूर्ख उन्मत्त होऊन बेपर्वा बनतो;
१७ शीघ्रकोपी मूर्खपणा करितो;
दुष्ट संकल्प योजणाऱ्याचा लोक द्वेष करितात.
१८ भोळे मूर्खतारूप वतन पावतात,
पण शहाणे ज्ञानरूप मुकुट धारण करितात.
१९ दुर्जन सज्जनांपुढें नमतात,
दुष्ट लोक धार्मिकाच्या दारापुढें नमतात.
२० गरिबाचा द्वेष त्याचा शेजारीहि करितो,
पण श्रीमंताला चाहणारे बहुत असतात.
२१ जो आपल्या शेजाऱ्याचा तिरस्कार करितो
तो पापी होय,
पण गरिबांवर दया करितो तो धन्य होय.
२२ दुष्टपणाची मसलत करणारे भ्रांत नव्हत काय?
चांगल्याची मसलत करणाऱ्यांस दया व सत्य
हीं प्राप्त होतात.

२३ सर्व श्रमांत लाभ आहे,
पण तोंडाच्या वटवटीनें दारिद्र्य येतें.
२४ सुज्ञांचें धन त्यांचा मुकुट आहे;
मूर्खांची मूर्खता केवळ मूर्खताच राहते.
२५ खरा साक्षी लोकांचे प्राण सोडवितो;
पण जो आपल्या मुखावाटे लबाडी उच्चारितो तो दगलबाजी करितो.
२६ परमेश्वराचें भय धरिल्यानें श्रद्धा दृढ होते;
आणि ज्यांच्या ठायीं श्रद्धा असते त्यांच्या मुलांस ती आश्रयस्थान होते.
२७ परमेश्वराचें भय जीवनाचा झरा होय,
तें मृत्युपाश चुकवितें.
२८ प्रजावृद्धींत राजाचें वैभव असतें;
प्रजा नसल्यानें अधिपतीचा नाश होतो.
२९ ज्याला लवकर क्रोध येत नाहीं
तो महाबुद्धिवान् होय;
उतावळ्या स्वभावाचा माणूस मूर्खता प्रकट करितो.
३० शांत अंतःकरण देहाचें जीवन आहे,
पण मत्सरानें हाडें कुजतात.
३१ जो गरिबाला छळितो तो आपल्या उत्पन्नकर्त्याचा अवमान करितो,
पण जो गरजवंतावर दया करितो तो त्याचा सन्मान करितो.
३२ विपत्ति आली असतां दुर्जन चीत होतो,
पण धार्मिकास मरणसमयींहि उमेद असते.
३३ बुद्धिमानाच्या अंतःकरणांत ज्ञान स्थिर असतें,
पण मूर्खांच्या अंतर्यामींची गोष्ट तेव्हांच कळते.
३४ धार्मिकता राष्ट्राची उन्नति करिते;
पापानें प्रजेची अप्रतिष्ठा होते.
३५ शहाण्या सेवकावर राजाचा प्रसाद होतो,
पण निर्लज्जपणें वागणाऱ्यावर तो रुष्ट होतो.

१५

१ मृदु उत्तरानें कोपाचें निवारण होतें;
कठोर शब्दानें क्रोध उत्तेजित होतो.
२ सुज्ञांची जिव्हा सुज्ञान वदते;
मूर्खांच्या मुखांतून मूर्खता बाहेर पडते.
३ परमेश्वराचे नेत्र सर्वत्र आहेत,
ते बरेंवाईट पाहत असतात.
४ जिव्हेची सौम्यता जीवनाचा वृक्ष आहे,
पण तिची कुटिलता अंतःकरण विदारिते.
५ मूर्ख आपल्या बापाचें शिक्षण तुच्छ मानितो;
वाग्दंड लक्षांत ठेवितो तो शहाणा होतो.
६ धार्मिकाच्या गृहांत मोठें भांडार असतें;
दुर्जनाच्या मिळकतींत उपद्रव असतो.
७ ज्ञान्यांची वाणी विद्येचा प्रसार करिते;
मूर्खांचें हृदय स्थिर नसतें.
८ दुर्जनांचा यज्ञ परमेश्वराला वीट आणितो,
परंतु सरळांची प्रार्थना त्याला आनंदविते.
९ दुर्जनांचा मार्ग परमेश्वराला वीट आणितो,
पण जो नीतीला अनुसरतो तो त्याला प्रिय आहे.
१० जो सन्मार्ग सोडितो त्याला भारी शासन होतें;
जो वाग्दंडाचा तिटकारा करितो तो मरेल.
११ अधोलोक आणि विनाशस्थान[1] हीं परमेश्वराच्या दृष्टीपुढें आहेत;
तर मग मनुष्यजातीचीं अंतःकरणें त्याच्या दृष्टीपुढें किती जास्त असलीं पाहिजेत !
१२ धर्मनिंदकाला वाग्दंड आवडत नाहीं;
तो ज्ञान्यांकडे जात नाहीं;
१३ आनंदी मनानें मुख प्रसन्न होतें;
मनांतील खेदानें हृदय भंग पावतें.
१४ बुद्धिमानाचें मन ज्ञानाचा शोध करितें;
मूर्खांचें मुख मूर्खता भक्षितें;
१५ दुःखग्रस्ताला सर्व दिवस वाईट असतात,
पण ज्याचें हृदय आनंदी असतें त्याला सदा मेजवानी असते.
१६ बहुत धन असून त्याच्याबद्दल दगदग सोसावी लागणें यापेक्षां
तें थोडकें असून परमेश्वराचें भय बाळगणें हें बरें;
१७ पोसलेल्या बैलाची मेजवानी देऊन
मनांत द्वेष वागविणें,

१ मुळांत : अबद्दोन

यापेक्षां प्रेमाची भाजीभाकरी बरी.
१८ तापट मनुष्य तंटा उपस्थित करितो;
मंदक्रोध झगडा शमवितो;
१९ आळशाची वाट कांटेरी कुंपणासारखी असते,
पण सरळांची वाट राजमार्ग बनते.
२० शहाणा मुलगा बापाला आनंदवितो;
मूर्ख मनुष्य आपल्या आईला तुच्छ मानितो.
२१ बुद्धिहीन इसम मूर्खपणांतच आनंद मानितो;
समंजस मनुष्य सरळ मार्गानें जातो.
२२ मसलत मिळाली नाहीं म्हणजे बेत निष्फळ होतात;
मसलत देणारे पुष्कळ असले म्हणजे ते
सिद्धीस जातात.
२३ मनुष्य आपल्या तोंडच्या समर्पक उत्तरानें
आनंद पावतो;
समयोचित बोल किती उत्तम !
२४ सुज्ञ इसमानें खालीं अधोलोकास जाऊं नये म्हणून
त्याचा जीवनमार्ग वर जातो.
२५ परमेश्वर गर्विष्ठांचें घर जमीनदोस्त करितो,
पण विधवेची मेर कायम राखितो.
२६ परमेश्वराला दुष्ट कल्पनांचा वीट आहे,
पण ममतेचीं वचनें त्याच्या दृष्टीनें शुद्ध आहेत.
२७ धनलोभी आपल्या कुटुंबाला त्रास देतो,
पण ज्याला लाचेचा तिटकारा असतो तो वांचतो.
२८ धार्मिक मनुष्य विचार करून उत्तर देतो,
पण दुर्जनांचें मुख वाईट गोष्टी बाहेर टाकितें.
२९ परमेश्वर दुर्जनांपासून दूर राहतो,
पण तो धार्मिकांची प्रार्थना ऐकतो.
३० नेत्रांचें तेज अंतःकरणाला उल्लासवितें;
चांगलें वर्तमान हाडें पुष्ट करितें.
३१ जीवनाच्या शिक्षणाकडे जो कान देतो
तो ज्ञान्यांमध्यें वस्ती करितो.
३२ जो शिक्षण अव्हेरितो तो आपल्या जिवाला
तुच्छ लेखितो;
जो वाग्दंड ऐकून घेतो तो ज्ञान मिळवितो.
३३ परमेश्वराचें भय हें सुज्ञतेचें शिक्षण होय;
आधीं नम्रता मग मान्यता.

१६

१ मनांत योजना करणें मनुष्याच्या
हातचें आहे,
पण जिव्हेनें उत्तर देणें परमेश्वराकडचें आहे;
२ मनुष्याचे सर्व मार्ग त्याच्या दृष्टीनें शुद्ध असतात,
पण परमेश्वर आत्मे तोलून पाहतो.
३ आपलीं सर्व कार्यें परमेश्वरावर सोप,
म्हणजे तुझे बेत सिद्धीस जातील.
४ परमेश्वरानें सर्व कांहीं विशेष उद्देशानें निर्माण
केलें आहे,
दुर्जन देखील अरिष्टाच्या दिवसासाठीं केलेला आहे.
५ प्रत्येक गर्विष्ठ मनाच्या मनुष्याचा
परमेश्वराला वीट येतो;
त्याला शिक्षा झाल्यावांचून राहणार नाहीं हें मी
टाळी देऊन सांगतों.
६ दया व सत्य यांच्या योगानें पापाचें क्षालन होतें,
आणि परमेश्वराचें भय बाळगिल्यानें मनुष्यें
दुष्कर्मापासून दूर राहतात.
७ मनुष्याचे मार्ग परमेश्वराला आवडले
म्हणजे तो त्याच्या शत्रूंसहि त्याच्याशीं समेट
करावयास लावितो.
८ अन्यायानें मिळविलेल्या मोठ्या मिळकतीहून,
न्यायानें कमविलेलें थोडें बरें.
९ मनुष्याचें मन मार्ग योजितें,
पण परमेश्वर त्याच्या पावलांस मार्ग दाखवितो.
१० राजाच्या तोंडचे शब्द देववचन आहेत,
न्याय करितांना त्याचें मुख अन्याय करीत नाहीं.
११ खरी तागडी व खरीं पारडीं परमेश्वराचीं आहेत;
पिशवींतील सर्व वजनें त्याचींच आहेत.
१२ दुष्कर्म करणें राजांस अमंगल आहे;
कारण गादी धर्मानेंच स्थिर राहते.
१३ धार्मिकतेची वाणी राजांस आनंद देणारी आहे,
यथान्याय बोलणाऱ्यावर ते प्रेम करितात.
१४ राजाचा संताप मृत्युदूतांसारखा आहे;
सुज्ञ मनुष्य त्याचें शमन करितो.

१५ राजाच्या मुखतेजांत जीवन आहे;
त्याची प्रसन्नता सरत्या पावसाच्या
मेघासारखी आहे.
१६ ज्ञानप्राप्ति उत्कृष्ट सोन्यापेक्षां किती उत्तम आहे!
सुज्ञता संपादन करणें रुप्यापेक्षां इष्ट आहे.
१७ दुष्कर्मापासून दूर राहणें हा सरळांचा धोपट
मार्ग होय;
जो आपला मार्ग धरून राहतो तो आपला
जीव राखितो.
१८ गर्व झाला कीं नाश ठेवलेला;
मनाचा ताठा अधःपाताचें मूळ होय.
१९ गर्विष्ठांबरोबर राहून लूट वांटून घेण्यापेक्षां
दीनांबरोबर नम्रचित्त असणें बरें.
२० जो वचनाकडे लक्ष पुरवितो त्याचें कल्याण होतें;
जो परमेश्वरावर भाव ठेवितो तो धन्य.
२१ जो मनाचा सुज्ञ त्याला समंजस म्हणतात,
मधुर वाणीनें शिक्षणाचा संस्कार अधिक होतो.
२२ ज्याच्या ठायीं सुज्ञता असते त्याला ती जीवनाच्या
झऱ्याप्रमाणें होय,
पण मूर्खांची मूर्खता हीच त्यांचें शासन होय.
२३ ज्ञान्याच्या हृदयापासून त्याच्या मुखास
शिक्षण मिळतें;
तें त्याच्या वाणींत ज्ञानाची भर घालितें.
२४ ममतेचीं वचनें मधाच्या पोळ्यासारखीं
मनाला गोड व हाडांस आरोग्य देणारीं आहेत.
२५ मनुष्याला एक मार्ग सरळ दिसतो,
पण त्याच्या शेवटास मृत्युपथ फुटतात.
२६ मजुराची क्षुधा त्याच्या हातून मजुरी करविते,
कारण त्याचें तोंड त्याला ती करावयास लावितें.
२७ अधम कुयुक्ति उकरून काढितो;
त्याच्या वाणींत जशी काय जळती आग असते.
२८ कुटिल मनुष्य वैमनस्य पसरितो;
कानास लागणारा मोठ्या स्नेह्यांत फूट पाडितो
२९ उद्दाम मनुष्य आपल्या शेजाऱ्याला भुलथाप देऊन
कुमार्गास लावितो.
३० कुटिल कल्पना योजण्याला जो डोळे मिचकावितो
व ओठ चावितो तो दुष्कर्म घडवून आणितो.
३१ पिकलेले केस शोभेचा मुकुट होत;
धर्ममार्गानें चालल्यानें तो प्राप्त होतो.
३२ ज्याला लवकर क्रोध येत नाहीं तो पराक्रम
करणाऱ्यापेक्षां श्रेष्ठ होय;
आत्मसंयमन करणारा नगर जिंकणाऱ्यापेक्षां
श्रेष्ठ होय.
३३ पदरांत चिठ्या टाकितात,
पण त्याची सर्व योजना परमेश्वराकडून होते.

## १७

१ एकाद्या घरांत मेजवानीची चंगळ असून
त्यांत कलह असला
तर त्यापेक्षां शांति असून कोरडा तुकडा
मिळाला तरी तो बरा.
२ शहाणा सेवक लज्जा आणणाऱ्या मुलावर
हुकमत चालवील,
व भाऊबंदांच्या वतनाचा विभागी होईल.
३ रुपें मुशींत व सोनें भट्टींत तावून पाहतात,
पण परमेश्वर हृदयें पारखितो.
४ दुःकर्मी मनुष्य दुष्ट वाणी लक्ष देऊन ऐकतो;
लबाड मनुष्य उपद्रवी जिव्हेला कान देतो.
५ जो गरिबाची कुचेष्टा करितो तो उत्पन्न करणा-
ऱ्याचा अवमान करितो;
जो दुसऱ्याच्या विपत्तीनें आनंद पावतो त्याला
शिक्षा चुकणार नाहीं.
६ पुत्रपौत्र वृद्धांचा मुकुट होत;
मुलांची शोभा त्यांचे वडील होत;
७ उत्कृष्ट बोलणें मूर्खाला शोभत नाहीं;
मग खोटें बोलणें सरदारांस कसें शोभेल?
८ घेणाऱ्याच्या दृष्टीनें लांच रत्नासारिखी
मोलवान् आहे;
ज्या ज्या कामाकडे तो वळतो
तें तो चातुर्यानें करितो.
९ जो इतराच्या अपराधावर झाकण घालितो तो
प्रेमाची वृद्धि करितो;

पण जो गत गोष्टी घोकीत बसतो
त्याला मित्र अंतरतात.
१० वाग्दंड समंजसाच्या मनावर ठसतो,
तसे शंभर फटके मूर्खाच्या मनावर ठसत नाहींत.
११ फितुरी मनुष्य केवळ बंड करूं पाहतो,
म्हणून त्याजकडे निर्दय जासूद
पाठविण्यांत येईल.
१२ जिचीं पोरें चोरून नेलीं आहेत अशा अस्वलीची
गांठ पडलेली पुरवली,
पण मूर्खतेंत खितपत असलेल्या मूर्खाची
गांठ न पडो.
१३ जो बऱ्याची फेड वाईटानें करितो,
त्याच्या घरांतून अरिष्ट जाणार नाहीं.
१४ कोणीं धरणाला छिद्र पाडून पाणी वाहूं द्यावें
त्याप्रमाणें भांडणाचा आरंभ होतो,
म्हणून भांडण पेटण्यापूर्वी बाचाबाची सोडून द्यावी.
१५ दुष्टास निर्दोष ठरविणारा आणि धार्मिकास
दोषी ठरविणारा,
ह्या दोघांचाहि परमेश्वराला वीट येतो.
१६ मूर्खाला बुद्धि नसतां
ज्ञानाची खरेदी करण्याकरितां तो हातीं द्रव्य कां घेतो?
१७ मित्र सर्व प्रसंगीं प्रेम करितो,
आणि विपत्कालासाठीं तो बंधु म्हणून निर्माण
झालेला असतो.
१८ बुद्धिहीन मनुष्य आपल्या शेजाऱ्यासमक्ष,
हातावर हात मारून जामीन होतो.
१९ जो कलहप्रिय तो अपराधप्रिय असतो;
जो आपलें दार उंच करितो
तो नाशाला आमंत्रण देतो.
२० ज्याचें चित्त उन्मत्त असतें त्याचें कल्याण होत नाहीं;
ज्याची जिव्हा कुटिल असते तो विपत्तींत पडतो.
२१ मूर्खाला जन्म देतो तो दुःखाची जोड करितो;
मूर्खाच्या बापाला आनंद नाहीं.
२२ आनंदी हृदय हें उत्कृष्ट औषध होय;
खिन्न हृदय हाडें शुष्क करितें.
२३ न्यायमार्ग विपरीत करण्यासाठीं,
दुर्जन आपल्या उरानजीक ठेविलेली लाच
काढून देतो.
२४ जो समंजस असतो त्याच्या डोळ्यांसमोर ज्ञान
असतें,
पण मूर्खाचे डोळे पृथ्वीच्या शेवटांकडे असतात.
२५ मूर्ख मुलगा आपल्या बापाला दुःख देतो
आणि आपल्या जन्मदात्रीला क्लेश देतो.
२६ धार्मिकास दंड करणें
व सरदारांस त्यांच्या सरळतेस्तव ताडण करणें
योग्य नाहीं.
२७ जो मित भाषण करितो त्याच्या अंगीं
शहाणपण असतें;
ज्याची वृत्ति शांत तो समंजस असतो.
२८ मौन धारण करणाऱ्या मूर्खालाहि शहाणा समजतात;
तो ओठ मिटून धरितो तेव्हां त्याला
समंजस मानितात.

## १८

१ जो फटकून राहतो तो आपली इच्छा
पुरवूं पाहतो,
व त्याला सगळ्या सुज्ञतेचा संताप येतो.
२ मूर्खाला ज्ञानाचा संतोष वाटत नाहीं,
तर केवळ आपल्या मनांत जें कांहीं आहे
तें प्रगट करण्यांतच त्याला संतोष वाटतो.
३ जेथें दुष्ट तेथें तिरस्कार,
आणि जेथें अधमता तेथें निंदा.
४ मनुष्याच्या तोंडचे शब्द खोल पाण्यासारखे आहेत,
ते वाहता ओढा व ज्ञानाचा झरा असे आहेत.
५ दुर्जनाचा पक्ष धरून
धार्मिकाचा न्याय विपरीत करणें उचित नाहीं.
६ मूर्ख कलहाला तोंड देतो;
त्याचें मुख चापटीला आमंत्रण करितें.
७ मूर्खाचा नाश त्याच्या तोंडामुळें होतो.
त्याची वाणी त्याच्या जिवाला पाश होय.
८ कानास लागणाऱ्याचे शब्द
स्वादिष्ट पक्वान्नासारखे आहेत,

ते अगदीं खोल पोटांत शिरतात.
९ आपल्या कामांत हयगय करणारा,
नासधूस करणाऱ्याचा भाऊ होय.
१० परमेश्वराचें नाम बळकट दुर्ग आहे,
त्यांत धार्मिक धावत जाऊन निर्भय राहतो.
११ धनवानाचें धन त्याचें बळकट नगर आहे,
त्याच्या मतें तें उंच तटासारखें आहे.
१२ नाशापूर्वी मनुष्याचें अंतःकरण गर्विष्ठ असतें;
आधीं नम्रता मग मान्यता.
१३ ऐकून घेण्यापूर्वी जो उत्तर देतो
त्याचें तें करणें मूर्खपणाचें व लज्जास्पद ठरतें.
१४ मनुष्याचें चित्त आपला व्याधि सहन करितें;
पण व्याकुळ चित्त कोणाच्यानें प्रसन्न करवेल?
१५ सुज्ञाचें मन ज्ञान प्राप्त करून घेतें;
शहाण्यांचे कान ज्ञानाविषयीं आतुर असतात.
१६ लाच मनुष्याचा मार्ग मोकळा करिते,
व त्याला बड्या लोकांसमोर नेते.
१७ जो आपला दावा प्रथम मांडितो त्याचा पक्ष
खरा भासतो,
पण त्याचा शेजारी येऊन त्याला कसाला लावितो.
१८ चिठ्या टाकिल्यानें झगडे मिटतात,
व झुंजार भिडण्याचे राहतात.
१९ दुखविलेल्या भावाची समजूत घालणें मजबूत
शहर जिंकण्यापेक्षां अवघड आहे;
कलह म्हटले म्हणजे ते दुर्गाच्या अडसरांसारखे होत.
२० मनुष्याला आपल्या तोंडाळपणाचीं फळें पोटभर
खावीं लागतात;
त्याला आपल्या वाणीचें पीक भोगिलें पाहिजे.
२१ जिव्हेच्या हातीं मृत्यु व जीवन हीं आहेत;
तिची आवड धरणारे तिचें फळ भोगितात.
२२ ज्याला गृहिणी लाभते त्यास उत्तम लाभ घडतो.
त्यास परमेश्वराचा अनुग्रह प्राप्त होतो.
२३ निर्धन विनवण्या करितो,
पण धनवान् निष्ठुरपणाचें उत्तर देतो.
२४ जो पुष्कळ मित्र मिळवितो तो आपला नाश
करून घेतो,
परंतु एखादा असा मित्र असतो कीं तो आपल्या
बंधूपेक्षांहि आपणास धरून राहतो.

१९

१ ज्याची वाणी कुटिल असून जो मूर्ख आहे,
त्याच्यापेक्षां सात्विकपणें चालणारा दरिद्री
बरा.
२ आत्मा ज्ञानहीन असणें बरें नाहीं;
उतावळ्या पायाचा मनुष्य वाट चुकतो.
३ मनुष्याची मूर्खता त्याला मार्गभ्रष्ट करिते,
आणि त्याचें मन परमेश्वरावर रुष्ट होतें.
४ संपत्ति मित्र जोडिते,
गरिबाला मित्र सोडितात.
५ खोटी साक्ष देणाराला शिक्षा चुकणार नाहीं;
लबाड बोलणारा सुटणार नाहीं.
६ थोर मनुष्याची बहुत लोक हांजीहांजी करितात;
दानशूराचा प्रत्येक जण मित्र असतो.
७ दरिद्र्याचे सर्व भाऊ त्याचा द्वेष करितात;
मग त्याचे मित्र त्याला सोडून जातात यांत
नवल तें काय!
त्यांनीं आपल्याशीं बोलावें म्हणून तो त्यांच्या
मागून जातो,
परंतु ते निघून जातात.
८ जो ज्ञान संपादन करितो तो आपल्या जिवावर
प्रेम करितो;
ज्याच्याठायीं सुज्ञता असते त्याचें कल्याण होतें.
९ खोटी साक्ष देणाऱ्याला शिक्षा चुकणार नाहीं,
लबाड बोलणारा नष्ट होईल.
१० ऐषआराम मूर्खाला शोभत नाहीं;
सरदारांवर दासानें सत्ता करावी
हें त्यास कसें शोभणार?
११ विवेकानें मनुष्य मंदक्रोध होतो;
अपराधाची गय करणें त्याला भूषण आहे.
१२ राजाचा कोप सिंहाच्या गर्जनेसारखा आहे;
त्याची प्रसन्नता गवतावर पडलेल्या
दहिंवरासारखी आहे.

१३ मूर्ख मुलगा आपल्या बापाला अरिष्टाप्रमाणें आहे;
बायकोच्या कटकटी सतत गळणाऱ्या ठिपक्यां-
प्रमाणें आहेत.
१४ घर व धन हीं वडिलांपासून मिळालेला
दायभाग होत;
सुज्ञ पत्नी परमेश्वरापासून प्राप्त होते.
१५ आळस घोर निद्रेंत लोटितो;
रिकामा फिरणारा उपाशीं मरतो.
१६ जो आज्ञा पाळितो तो आपले प्राण रक्षितो;
जो आपल्या वर्तनाविषयीं बेपर्वा असतो
तो मरेल.
१७ जो दरिद्र्यावर दया करितो तो परमेश्वराला
उसनें देतो;
त्याच्या सत्कृत्याची फेड तो करील.
१८ कांहीं आशा असेल तर आपल्या पुत्राला शासन कर;
त्याचें वाटोळें व्हावें अशी इच्छा धरूं नको.
१९ क्रोधाविष्ट मनुष्यानें आपला दंड भोगिला पाहिजे,
कारण त्याला एकदा दंडमुक्त केलें तर तसें पुनःपुनः
करावें लागेल.
२० सुबोध ऐक व शिक्षण स्वीकार,
म्हणजे आपल्या उरलेल्या आयुष्यांत तूं सुज्ञपणें
वागशील.
२१ मनुष्याच्या मनांत अनेक मसलती येतात,
परंतु परमेश्वराची योजना स्थिर राहते.
२२ मनुष्याच्या इच्छेवरून त्याच्या दयाळूपणाचें
मान समजतें;
लबाडापेक्षां दरिद्री बरा.
२३ परमेश्वराचें भय जीवनप्राप्तीचा मार्ग होय;
जो तें धरितो तो सुखानें नांदतो,
त्याचें वाईट होणार नाहीं.
२४ आळशी एकदा आपला हात ताटांत घालितो,
तो पुनः तोंडाकडे वर नेत नाहीं.
२५ धर्मनिंदकास ताडण कर म्हणजे भोळा
शहाणपणा शिकेल.
समंजसाला वाग्दंड कर म्हणजे त्याला ज्ञान कळेल.
२६ जो आपल्या बापाशीं दंडेली करितो व आपल्या
आईला हाकून लावितो,
तो लज्जा व अप्रतिष्ठा आणणारा मुलगा होय.
२७ माझ्या मुला, ज्ञानाचीं वचनें सोडून
भटकावयाचें असलें
तर शिक्षण घेणें सोडून दे.
२८ अधम साक्षी न्यायाची विटंबना करितो;
दुर्जनांचें मुख अधर्म गिळितें.
२९ धर्मनिंदकांसाठीं दंड,
व मूर्खांच्या पाठीसाठीं फटके सिद्ध केले आहेत.

## २०

१ द्राक्षारस चेष्टा करणारा आहे,
मद्य गलबला करणारें आहे,
त्यांच्यामुळें झिंगणारा शहाणा नव्हे.
२ राजाचा दरारा सिंहाच्या गर्जनेसारखा आहे,
त्याला जो राग आणितो तो आपल्या जिवाविरुद्ध
पाप करितो.
३ भांडणापासून दूर राहणें हें मनुष्याला
भूषणावह आहे,
पण प्रत्येक मूर्ख इसम कलह करीत राहतो.
४ हिंवाळा लागल्यामुळें आळशी नांगरीत नाहीं,
म्हणून हंगामाच्या वेळीं तो भीक मागेल;
पण त्याला कांहीं मिळणार नाहीं.
५ मनुष्याच्या मनांतील मसलत खोल पाण्यासारखी
असते,
तरी समंजस ती बाहेर काढितो.
६ दयेचा आव घालणारे बहुत आहेत,
पण भरवशाचा मनुष्य कोणास मिळतो ?
७ जो धार्मिक मनुष्य सात्विकपणें चालतो,
त्याच्यामागें त्याचीं मुलें धन्य होतात.
८ राजा न्यायासनावर बसतो
तेव्हां तो आपल्या नजरेनें सर्व दुष्टता
उडवून देतो.
९ मीं आपलें अंतःकरण पवित्र केलें आहे,
मीं आपल्या पापाचें क्षालन केलें आहे
असें कोण म्हणेल ?

१० वजनावजनांत व मापामापांत फरक असणें
या दोहोंचा परमेश्वराला वीट आहे.
११ वृत्ति शुद्ध आहे कीं नाहीं, नीट आहे कीं नाहीं,
हें मूलसुद्धां आपल्या कृत्यांनीं उघड करितें.
१२ ऐकणारे कान व पाहणारे डोळे,
हे दोन्ही परमेश्वरानें केले.
१३ निद्राप्रिय होऊं नको, झालास तर भिकेला लागशील;
आपले नेत्र उघड म्हणजे तुला पोटभर
अन्न मिळेल.
१४ हें पसंत नाहीं, तें पसंत नाहीं,
असें विकत घेणारा म्हणतो,
मग तेथून गेल्यावर बढाई मारितो.
१५ सोनें आहे व मोत्येंहि विपुल आहेत,
पण ज्ञानमय वाणी मोलवान् रत्न आहे.
१६ जो अनोळख्याला जामीन राहतो
त्याचें वस्त्र ठेवून घे,
तो परक्याला जामीन झाला आहे म्हणून त्याला
तारणादाखल ठेव.
१७ लबाडीची भाकरी मनुष्यास गोड लागते,
पण मग त्याच्या तोंडांत माती पडते.
१८ प्रत्येक बेत मसलतीनें सिद्धीस जातो;
शहाणपणानें मार्गास लागून युद्ध चालीव.
१९ जो चहाडी करीत फिरतो तो गुप्त गोष्टी
उघड करितो,
म्हणून बडबड करणाऱ्याची संगत धरूं नको.
२० जो बापाला किंवा आईला शाप देतो
त्याचा दीप मालवून त्याला निबिड काळोख होईल.
२१ आरंभीं उतावळीनें मिळविलेल्या धनाला शेवट
कल्याणकारक होत नाहीं.
२२ वाईटाचा बदला मी घेईन असें म्हणूं नको;
परमेश्वरावर भरवसा ठेवून राहा म्हणजे तो तुला
साहाय्य करील.
२३ वजनावजनांत फरक असणें याचा परमेश्वराला
वीट आहे,
आणि खोटी तागडी बरी नाहीं.
२४ मनुष्याचें जाणेंयेणें परमेश्वराच्या हातीं आहे,
तर कोणत्या मार्गानें जावें हें मनुष्याला कसें कळेल ?
२५ हें पवित्र आहे, असें उतावळीनें म्हणणें व असला
नवस केल्यावर मग विचार करीत बसणें,
हें मनुष्यानें पाशांत पडणें होय.
२६ सुज्ञ राजा दुर्जनांस पाखडून टाकितो,
त्यांजवर चाक फिरवून त्यांची मळणी करितो.
२७ मनुष्याचा आत्मा परमेश्वरानें दिलेला दीप होय,
त्यानें तो आपल्या अंतर्यामींच्या सर्व गोष्टींचें
निरीक्षण करितो.
२८ दया व सत्य हीं राजाचें रक्षण करितात;
तो दयेनें आपलें सिंहासन दृढ करितो.
२९ बल हें तरुणांस भूषण आहे;
पिकलेले केस वृद्धांची शोभा आहे.
३० जखम करणारे घाय आणि वर्मी लागणारे फटके
दुष्टतेचें क्षालन करितात.

२१

१ राजाचें मन पाटांच्या पाण्याप्रमाणें
परमेश्वराच्या हातीं आहे,
त्याला वाटेल तिकडे तो तें वळवितो.
२ मनुष्याचे सर्व मार्ग त्याच्या दृष्टीनें नीट आहेत,
पण अंतःकरणें तोलून पाहणारा परमेश्वर आहे.
३ धर्मानें व न्यायानें वागणें
हें परमेश्वराला यज्ञापेक्षां विशेष मान्य आहे.
४ चढेल दृष्टि व गर्विष्ठ अंतःकरण,
तसाच दुर्जनांच्या शेताचा उपज हीं पापरूप होत.
५ उद्योग्याचे विचार समृद्धि करणारे असतात;
जो कोणी उतावळी करितो तो दारिद्र्याकडे
धाव घेतो.
६ असत्य जिव्हेनें मिळविलेलें धन इकडेतिकडे उडून
जाणाऱ्या वाफेसारखें आहे;
मृत्यूच्या मागें लागणारे त्याला बोलावितात.
७ दुर्जनांचा बलात्कार त्यांस उडवून टाकील,
कारण ते न्यायानें वागण्यास तयार नसतात.
८ अपराधांचा भार वाहणाऱ्याचा मार्ग
फार कुटिल असतो,

पण जो शुद्ध असतो त्याचें वर्तन सरळ असतें.
९ भांडखोर बायकोबरोबर प्रशस्त घरांत राहण्यापेक्षां,
धाब्याच्या एका कोपऱ्याला बसणें पुरवलें.
१० दुर्जनाचें मन वाईट इच्छितें,
शेजाऱ्यावर तो कृपादृष्टि करीत नाहीं.
११ धर्मनिंदकास शासन केलें म्हणजे भोळा
शहाणा होतो;
सुज्ञास शिक्षण दिलें म्हणजे तो ज्ञान पावतो.
१२ न्यायी परमेश्वर दुर्जनाच्या घराकडे लक्ष देतो.
तो दुर्जनांला विपत्तींत पाडितो.
१३ गरिबाची आरोळी ऐकून जो कानांत बोटें घालितो
तोहि आरोळी करील, पण कोणी ऐकणार नाहीं.
१४ एकांतीं दिलेली देणगी राग शमविते,
पदरांत झाकिलेली लांच तीव्र कोप शमविते.
१५ न्याय झाल्यानें धार्मिकाला आनंद होतो,
पण अधर्म करणाऱ्यांचा त्यामुळें नाश होतो.
१६ ज्ञानपथापासून जो बहकतो
त्याला मेलेल्यांच्या मंडळींत विश्रांति मिळेल.
१७ ज्याला ख्यालीखुशाली आवडते तो दरिद्री होतो;
ज्याला द्राक्षारसाचा व सुगंधी तेलाचा शोक आहे
तो धनवान् होत नाहीं.
१८ धार्मिकाची खंडणी दुर्जन,
आणि सरळांचा मोबदला विश्वासघातकी असतो.
१९ भांडखोर बायकोजवळ राहून संताप करून घ्यावा
त्यापेक्षां अरण्यवास पुरवला.
२० सुज्ञाच्या घरांत मोलवान् वस्तु व तेल यांचा सांठा
असतो,
पण मूर्ख मनुष्य त्यांचा फन्ना उडवितो.
२१ जो धार्मिकता व दया यांस अनुसरून वर्ततो,
त्याला जीवन, धार्मिकता व सन्मान हीं प्राप्त होतात.
२२ सुज्ञ मनुष्य बलाढ्यांच्या नगराच्या तटावर चढून
त्यांचा आश्रयदुर्ग पाडून टाकितो.
२३ जो आपलें तोंड व जिव्हा संभाळितो,
तो संकटांपासून आपला जीव बचावितो.
२४ गर्विष्ठ व चढेल मनुष्याला उद्दाम म्हणतात,
तो गर्वाच्या ताठ्यानें वागतो.
२५ आळशाची वासना त्याला मारून टाकिते,
कारण त्याचे हात श्रम करण्यास कबूल नसतात.
२६ कोणी दिवसभर लाभाची हाव धरितात;
धार्मिक देतो, हात आखडीत नाहीं.
२७ दुर्जनांचें यज्ञार्पण वीट आणणारें असतें;
त्यानें तें दुष्कर्माबद्दल प्रायश्चित्त म्हणून आणिलें
तर मग तें किती अधिक वीट
आणणारें असणार !
२८ खोटा साक्षी नाश पावतो,
पण जो ऐकल्याप्रमाणें सांगतो त्याच्या सांगण्याला
कोणी हरकत घेत नाहीं.
२९ दुर्जन आपला हट्ट आपल्या मुखचर्येवर
व्यक्त करितो,
पण सरळ मनुष्य आपल्या वर्तनक्रमाचा
विचार करितो.
३० परमेश्वरापुढें शहाणपण, बुद्धि व युक्ति
हीं मुळींच चालत नाहींत.
३१ लढाईच्या दिवसासाठीं घोडा सज्ज करितात,
पण यश देणें परमेश्वराकडे असतें.

२२

१ चांगलें नांव विपुल धनाहून इष्ट होय;
प्रेमयुक्त कृपा सोन्यारुप्यापेक्षां उत्तम आहे.
२ सधन व निर्धन यांचा एकमेकांशीं
व्यवहार असतो,
त्या सर्वांचा निर्माणकर्ता परमेश्वर आहे.
३ चतुर मनुष्य अरिष्ट येतां पाहून लपतो;
भोळे पुढें जातात आणि हानि पावतात.
४ नम्रता व परमेश्वराचें भय
यांचें पारितोषिक धन, सन्मान व जीवन
हीं होत.
५ कुटिल मनुष्याच्या मार्गांत कांटे व पाश असतात;
ज्याला जिवाची काळजी असते त्यानें त्यापासून
दूर राहावें.
६ मुलाच्या स्थितीस अनुरूप असें शिक्षण त्याला दे,
म्हणजे वृद्धपणींहि तो त्यापासून परावृत्त होणार नाहीं.

७ धनिक मनुष्य निर्धनांवर सत्ता चालवितो,
ऋणको धनकोचा दास होतो.
८ जो दुष्कर्म पेरितो तो अनर्थाची कापणी करितो,
त्याच्या क्रोधाचा सोटा व्यर्थ होईल.
९ ज्याची दृष्टि उदार त्याचें कल्याण होतें,
कारण तो आपल्या अन्नांतून गरिबांस देतो.
१० उन्मत्तपणा करणाऱ्यास घालवून दे
म्हणजे भांडण मिटेल,
आणि कलह व अप्रतिष्ठा हीं बंद पडतील.
११ ज्याला मनाची शुद्धता आवडते, ज्याची वाणी
कृपामय असते,
अशाचा मित्र राजा असतो.
१२ परमेश्वराचे नेत्र ज्ञानाचे रक्षक आहेत,
पण विश्वासघातक्याचे शब्द तो व्यर्थ करितो.
१३ आळशी म्हणतो, बाहेर सिंह आहे,
भररस्त्यावर मी ठार होईन.
१४ परस्त्रियांचें मुख मोठा खाडा आहे;
ज्यावर परमेश्वराचा कोप होतो तो त्यांत पडतो.
१५ बालकाच्या हृदयांत मूर्खता जखडलेली असते;
शासनवेत्र त्याच्यापासून तिला घालवून देतें.
१६ आपलें धन वाढविण्यासाठीं जो गरिबास नाडितो
व धनिकास भेटी देतो तो भिकेस लागतो.

१७ ज्ञान्यांचीं वचनें कान लावून ऐक,
माझ्या ज्ञानाकडे चित्त लाव,
१८ कारण तीं तूं अंतर्यामीं वागविलीं
व आपल्या वाणीच्या ठायीं स्थापलीं तर किती
चांगलें होईल.
१९ परमेश्वरावर तुझा भाव असावा,
म्हणून मीं तुला तीं वचनें आज कळविलीं आहेत.
२०–२१ सत्याच्या वचनांचें तत्त्व तुला कळावें,
व तुला पाठविणाऱ्यांना सत्याचीं वचनें तूं परत
जाऊन सांगावीं म्हणून
मसलती व ज्ञान यांनीं युक्त अशा उत्कृष्ट गोष्टी
मीं तुला लिहून दिल्या नाहींत काय ?

२२ गरीब हा केवळ गरीब आहे म्हणून त्याला
नाडूं नको,
आणि वेशींत विपन्नावर जुलूम करूं नको;
२३ कारण परमेश्वर त्यांचा कैवार घेईल,
आणि त्यांस नागविण्याऱ्यांचा जीव नागवील.
२४ रागीट मनुष्याशीं मैत्री करूं नको;
कोपिष्ठाची संगति धरूं नको,
२५ धरिशील तर त्याची चालचलणूक शिकून
आपला जीव पाशांत घालिशील.
२६ हातावर हात मारणारे
व कर्जाला जामीन होणारे यांतला तूं होऊं नको
२७ तुजजवळ कर्ज फेडण्यास कांहीं नसलें
म्हणजे तुझ्या अंगाखालचें अंथरूण काढून
तो नेईल अशी पाळी तूं कां येऊं द्यावी ?
२८ तुझ्या पूर्वजांनीं घातलेली मेर सारूं नको.
२९ आपल्या धंद्यांत चपळ असा कोणी तुला
दिसतो काय ?
त्याचें स्थान राजांसमोर आहे,
हलकट लोकांसमोर नाहीं.

## २३

१ अधिपतीबरोबर भोजनास बसतोस
तेव्हां तुजपुढें कोण आहे याचा पूर्ण
विचार कर;
२ तूं खादाड असलास
तर तूं आपल्या गळ्याला सुरी लाव.
३ त्याच्या मिष्टान्नांची इच्छा करूं नको;
तीं कपटाचीं खाद्यें आहेत.
४ धनवान् होण्यासाठीं धडपड करूं नको;
आपलें चातुर्य एकीकडे ठेव.
५ जें पाहतां पाहतां नाहींसें होतें त्याकडे तूं नजर
लावावी काय ?
कारण गगनांत उडणाऱ्या गरुडासारखे पंख धन
आपणास लावितें.
६ दुष्टदृष्टि मनुष्याचें अन्न खाऊं नको,
त्याच्या मिष्टान्नाची इच्छा करूं नको;

७ कारण तो आपल्या मनांत घास मोजणाऱ्या-
सारखा आहे,
तो तुला खा; पी म्हणतो,
पण त्याचें मन तुजकर नाहीं.
८ गिळलेला घास तूं ओकून टाकिशील,
तुझें गोड बोलणें व्यर्थ होईल.
९ मूर्खाच्या कानांत कांहीं सांगूं नको,
तुझे शहाणपणाचे बोल तो तुच्छ मानील.
१० जुनी मेर सारूं नको;
अनाथांच्या शेतांत शिरूं नको;
११ कारण त्यांचा कैवारी समर्थ आहे;
तो त्यांचा कैवार घेऊन तुजविरुद्ध होईल.
१२ तूं आपलें मन शिक्षणाकडे
आणि आपले कान ज्ञानाच्या वचनांकडे लाव.
१३ मुलास शिक्षा करण्यास अनमान करूं नको,
कारण त्याला छडी मारिल्यानें
तो मरणार नाहीं.
१४ तूं त्यास छडी मार
आणि अधोलोकापासून त्याचा जीव वांचीव.
१५ माझ्या मुला, तुझें चित्त सुज्ञ असलें
तर माझ्या, माझ्याच चित्ताला आनंद होईल;
१६ तुझ्या वाणींतून यथार्थ बोल निघाल्यास
माझें अंतर्याम उल्लासेल.
१७ पातक्यांचा हेवा करूं नको,
तर परमेश्वराचें भय अहर्निश बाळग;
१८ कारण पारितोषिक निश्चयें मिळणार;
तुझी आशा नष्ट होणार नाहीं.
१९ माझ्या मुला, तूं ऐकून शहाणा हो
व आपलें मन सरळ मार्गांत राख.
२० मद्यपी व मांसाचें अतिभक्षण करणारे
यांच्या वाऱ्यास राहूं नको;
२१ कारण मद्यपी व खादाड दरिद्री होतात,
कैफ मनुष्याला चिंध्या नेसवितो.
२२ तूं आपल्या जन्मदात्या बापाचें ऐक,
आपल्या वृद्ध झालेल्या आईला तूं तुच्छ मानूं नको.
२३ सत्य, सुज्ञता, शिक्षण व समंजसपणा,
हीं विकत घे, विकूं नको.
२४ धार्मिकाचा बाप फार उल्लासतो;
सुज्ञ मुलास जन्म देतो तो त्याजविषयीं
आनंद पावतो.
२५ तुझीं मातापितरें आनंद पावोत,
तुझी जन्मदात्री हर्ष पावो.
२६ माझ्या मुला, तूं आपलें चित्त मला दे,
माझे मार्ग तुझ्या दृष्टीला आनंद देवोत.
२७ वेश्या खोल खाचेसारखी आहे;
परस्त्री अरुंद कूपासारखी आहे.
२८ ती लुटारूसारखी टपून राहते
आणि मनुष्यांतील विश्वासघातक्यांची
संख्या वाढविते.

२९ हाय हाय कोण म्हणतो? अरे अरे कोण करितो?
तंट्याभांडणांत कोण पडतो?
गाऱ्हाणीं कोण सांगतो? विनाकारण घाय
कोणास होतात?
धुंदी कोणाच्या डोळ्यांत असते?
३० जे फार वेळपर्यंत द्राक्षारस पीत राहतात,
जे मिश्रमद्याचा पूर्ण आस्वाद घेण्यास
जातात त्यांच्या.
३१ द्राक्षारस कसा तांबडा दिसतो,
प्याल्यांत कसा चमकतो,
घशांतून खालीं कसा सहज उतरतो
हें पाहत बसूं नको.
३२ शेवटीं तो सर्पासारखा दंश करितो,
फुरशाप्रमाणें झोंबतो.
३३ तुझे डोळे विलक्षण प्रकार पाहतील;
तुझ्या मनांतून विपरीत गोष्टी बाहेर पडतील;
३४ समुद्रामध्यें आडवा पडलेल्याच्यासारखी,
डोलकाठीच्या माथ्यावर आडवा पडलेल्याच्या-
सारखी तुझी स्थिति होईल.
३५ तूं म्हणशील, त्यांनीं मला ताडण केलें तरी माझें

कांहीं दुखलें नाहीं,
त्यांनीं मला मारिलें तरी मला कांहीं लागलें नाहीं;
मी शुद्धीवर केव्हां येईन ?
मी पुनः त्याचें सेवन करीन.

२४

१ दुर्जनांचा हेवा करूं नको,
त्यांच्या संगतीची इच्छा धरूं नको.
२ त्यांचें अंतःकरण बलात्कार करण्याचा
बेत करितें,
त्यांच्या वाणींतून घातपाताचे बोल निघतात.
३ सुज्ञानाच्या योगें घर बांधितां येतें;
समंजसपणानें तें मजबूत राहतें;
४ ज्ञानाच्या योगें त्याच्या खोल्या
सर्व प्रकारच्या मोलवान् व मनोरम वस्तूंनीं भरून
जातात.
५ सुज्ञ पुरुष बलवान् असतो;
ज्ञानी मनुष्य आपलें बल दृढ करितो.
६ शहाणपणानें व्यवस्था करून युद्ध चालीव;
बहुत सुमंत्री असल्यानें यश मिळतें.
७ ज्ञान मूर्खाच्या आटोक्याबाहेर असतें;
वेशीवर तो आपलें तोंड उघडीत नाहीं.
८ जो दुष्कर्म करण्याचें योजितो,
त्याला लोक घातकी माणूस म्हणतात.
९ मूर्खाचा विचार पापरूप असतो;
धर्मनिंदकाचा लोकांस वीट येतो.
१० संकटकालीं तुझें धैर्य खचलें
तर तुझी शक्ति अल्प होय.
११ ज्यांना ठार मारण्यासाठीं धरून नेत असतील
त्यांस सोडीव,
ज्यांच्या वधाची तयारी झाली आहे
त्यांचा बचाव करण्याचा साधेल तेवढा
प्रयत्न कर.
१२ आम्हांस हें ठाऊक नव्हतें असें म्हणसील
तर हृदयें तोलून पाहणाऱ्यास
हें कळत नाहीं काय ?
तुझा जीव राखणाऱ्याला माहीत नाहीं काय ?
तो प्रत्येकास ज्याच्या त्याच्या कृतीप्रमाणें प्रतिफल
देत नाहीं काय ?
१३ माझ्या मुला, मध खा, तो चांगला आहे,
मधाचें पोळें खा, तें तुझ्या जिभेला गोड लागतें;
१४ असेंच ज्ञान तुझ्या जिवाला आहे असें समज;
तें तुला प्राप्त झालें तर फलप्राप्ति घडेल;
तुझी आशा खुंटणार नाहीं.
१५ अरे दुष्टा, धार्मिकाच्या घराचा नाश करण्यास
टपूं नको,
त्याच्या विश्रांतिस्थानाचा बिघाड करूं नको;
१६ कारण धार्मिक सात वेळां पडला तरी पुनः उठतो,
पण दुर्जन अरिष्ट आल्याबरोबर
जमीनदोस्त होतात.
१७ तुझा वैरी पडला तर त्याबद्दल आनंद मानूं नको,
तो जमीनदोस्त झाल्यानें तुझें मन उल्लासूं नये;
१८ उल्लासलें तर तें परमेश्वर पाहील, आणि त्याला तें
आवडणार नाहीं,
आणि तो त्याच्यापासून आपला क्रोध फिरवील;
१९ दुष्कर्म्यांवर जळफळूं नको;
दुर्जनाचा मत्सर करूं नको.
२० कारण दुष्कर्म्यास चांगली गति नाहीं;
दुर्जनांचा दीप मालवेल.
२१ माझ्या मुला, परमेश्वराचें व राजाचें भय बाळग.
चंचलवृत्तीच्या मनुष्यांत मिसळूं नको;
२२ कारण त्यांजवर विपत्ति अचानक येईल,
आणि त्यांच्या आयुष्याचा क्षय केव्हां होईल
कोण जाणे ?

२३ हीहि सुज्ञांचीं वचनें आहेत;

तोंड पाहून न्याय करणें ठीक नाहीं.
२४ तूं धार्मिक आहेस असें जो दुर्जनास म्हणतो,
त्याला लोक शाप देतील,
राष्ट्रें त्याचा तिटकारा करितील;
२५ पण जे दुर्जनास ठपका देतील त्यांचें बरें होईल,

त्यांस चांगला आशीर्वाद मिळेल.
२६ जो योग्य उत्तर देतो
तो जणू काय ओठांचें चुंबन देतो.
२७ तुझें बाहेरचें व शेतांतलें जें काम तें आधीं कर,
मग आपलें घर बांध.
२८ आपल्या भाऊबंदाविरुद्ध विनाकारण साक्ष
देऊं नको;
तूं आपल्या वाणीनें ठकवूं नको.
२९ मी जशास तसें करीन,
त्याचें उसनें फेडीन, असें म्हणूं नको.
३० एकदा मी आळशाच्या शेताजवळून,
बुद्धिहीनाच्या द्राक्षमळ्याजवळून जात होतों;
३१ तों तो कांटेऱ्यांनीं भरून गेला आहे,
त्याची जमीन खाजकुइरीनें व्यापिली आहे,
व त्याची दगडी भिंत कोसळली आहे,
असें मला आढळलें.
३२ तें मीं पाहिलें, त्याचा विचार केला,
आणि तें पाहून मीं बोध घेतला.
३३ आणखी थोडीशी झोप घेतों, आणखी थोडीशी
डुकली घेतों,
हात उराशीं धरून जरा निजतों,
३४ असें म्हणत जाशील तर दारिद्र्य तुला
दरोडेखोराप्रमाणें,
गरिबी तुला हत्यारबंद माणसाप्रमाणें गांठील.

२५ १ हींहि शलमोनाचीं नीतिसूत्रें आहेत;
यहूदाचा राजा हिज्कीया याच्या मनुष्यांनीं
यांचा संग्रह केला :

२ एकादी गोष्ट गुप्त ठेवणें यांत देवाचें गौरव आहे;
पण एकाद्याचा शोध लावणें यांत राजांचें
गौरव आहे.
३ उंचीमुळें आकाशाचा, खोलीमुळें पृथ्वीचा,
व राजांच्या मनाचा थांग लागत नाहीं.
४ रुप्यांतला गाळ काढून टाक,
म्हणजे धातु गाळणाऱ्यासाठीं त्याचें चांगलें
पात्र बनतें;
५ राजासमोरून दुर्जनाला घालवून दे,
म्हणजे त्याचें सिंहासन धर्माच्या ठायीं
स्थापीत होईल.
६ राजासमोर आपली प्रतिष्ठा मिरवूं नको;
थोर लोकांच्या जागीं उभा राहूं नको;
७ कारण कोणा सरदारास येतांना पाहून त्याच्या-
समोर तुला खालच्या जागीं बसविण्यांत यावें,
त्यापेक्षां वर येऊन बैस असें तुला म्हणावें हें बरें.
८ फिर्याद करावयास जाण्याची उतावळी करूं नको,
ती तूं केली आणि तुझ्या शेजाऱ्यानें तुझी
फजिती केली
तर परिणामीं काय करूं असें तुला होऊन जाईल.
९ तुझा व तुझ्या शेजाऱ्याचा वाद असला
तर तो चालीव,
पण इतराच्या गुप्त गोष्टी बाहेर फोडूं नको;
१० फोडिल्या तर ऐकणारा तुझी निर्भर्त्सना करील,
आणि हें दूषण तुला लागून राहील.
११ रुपेरी करंड्यांत सोन्याचीं फळें,
तसें समयोचित भाषण होय.
१२ सोन्याचें कर्णभूषण आणि उत्कृष्ट
सोन्याचा दागिना,
तसा सुज्ञ उपदेशक लक्ष देणाऱ्या कानाला आहे.
१३ कापणीच्या समयीं जसें बर्फाचें पेय,
तसा विश्वासू जासूद
त्याला पाठविणाऱ्यास आहे,
कारण तो आपल्या धन्यांचा जीव गार करितो.
१४ मेघ व वारा असून वृष्टि नाहीं,
त्याप्रमाणें आपल्या देणग्यांची खोटी आढ्यता
मिरविणारा आहे.
१५ बराच वेळ धीर धरल्यानें न्यायाधीशाचें मन वळतें,
नरम जीभ हाड फोडिते.
१६ मध सांपडल्यास तुला तो पुरे इतकाच खा,
जास्त खाल्ला तर तुला वांति होईल.

१७ शेजाऱ्याच्या घरीं आपलें पाऊल विरळा टाक,
नाहीं तर त्याला कंटाळा येऊन तो तुझा द्वेष करील.
१८ जो शेजाऱ्याविरुद्ध खोटी साक्ष देतो
तो घण, तरवार व तीक्ष्ण बाण यांसारखा आहे.
१९ संकटसमयीं विश्वासघातक्यावर भरवसा ठेवणें
हें तुटलेल्या दातानें खाणें, लचकलेल्या पायानें
चालणें यांसारखें आहे.
२० थंडीच्या दिवसांत अंगावरील पांघरूण काढणें,
सोऱ्यावर शिरका घालण्यासारखें
आणि खिन्न हृदयापुढें गायन
करण्यासारखें आहे.
२१ तुझा शत्रु भुकेला असल्यास त्याला खावयाला दे,
तान्हेला असल्यास त्याला पाणी प्यावयाला दे;
२२ असें केल्यानें त्याच्या मस्तकावर तूं निखाऱ्यांची रास
केल्यासारखें त्याला होईल,
आणि परमेश्वर तुला प्रतिफल देईल.
२३ उत्तरेचा वारा पाऊस आणितो,
त्याप्रमाणें चुगलखोर जीभ मुद्रा क्रोधाविष्ट करिते.
२४ भांडखोर बायकोबरोबर प्रशस्त घरांत राहण्यापेक्षां
धाब्याच्या एका कोपऱ्याला बसणें पुरवलें.
२५ तान्हेल्या जिवाला जसें गार पाणी,
तसें दूर देशाहून आलेलें शुभ वर्तमान होय.
२६ दुर्जनापुढें स्थानभ्रष्ट झालेला धार्मिक
हा गढूळ केलेला झरा, नासलेलें जलकुंड
याप्रमाणें आहे.
२७ मधाचें अति सेवन करणें बरें नाहीं;
तसें मनुष्यानें आपल्या गौरवाच्या पाठीस लागण्यांत कांहीं गौरव नाहीं.
२८ ज्या मनुष्याचें चित्त स्वाधीन नाहीं,
तो गांवकुसूं नसलेल्या पडक्या गांवासारखा आहे.

२६

१ उन्हाळ्यांत जसें बर्फ, कापणीच्या समयीं
जसा पाऊस,
तसा मूर्खाला सन्मान शोभत नाहीं.
२ भ्रमण करणारी चिमणी व उडणारी निळवी
यांप्रमाणें निष्कारण दिलेला शाप कोठेंच ढळत नाहीं.
३ घोड्याला चाबूक, गाढवाला लगाम,
मूर्खांच्या पाठीला बडगा.
४ मूर्खाला त्याच्या मूर्खतेप्रमाणें उत्तर देऊं नको,
देशील तर तूं त्याच्यासारखा ठरशील.
५ मूर्खाला त्याच्या मूर्खतेला योग्य असें उत्तर दे,
नाहीं तर तो आपल्या मतें स्वतांला
शहाणा समजेल.
६ जो मूर्खाच्या हातीं निरोप पाठवितो
तो आपले स्वतांचे पाय कापून घेतो,
त्याचें नुकसान त्याच्या पदरीं पडतें.
७ लंगड्याचे पाय जसे कमजोर
तसें मूर्खाच्या तोंडचें नीतिवचन असतें.
८ मूर्खाला मान देणारा
गोफणींत गोटा घट्ट बांधणाऱ्यासारखा आहे.
९ मूर्खाच्या तोंडचें नीतिवचन,
झिंगलेल्या इसमाच्या हातांत शिरणाऱ्या
कांट्यासारखें आहे.
१० कुशल कारागीर सर्व वस्तु सिद्ध करितो,
आणि जो मूर्खाला कामास लावितो तो कोणाहि
आल्यागेल्यास कामास लावणाऱ्यासारखा आहे.
११ जो मूर्ख आपला मूर्खपणा पुनः पुनः करितो,
तो आपल्या ओकीकडे परतणाऱ्या
कुत्र्यासारखा होय.
१२ आपल्या शहाणपणाची घमेंड बाळगणारा इसम
तुला दिसतो काय?
अशा मनुष्यापेक्षां मूर्खाची अधिक आशा आहे.
१३ आळशी म्हणतो, रस्त्यावर सिंह आहे,
चवाठ्यावर सिंह आहे.
१४ दरवाजा आपल्या बिजागरांवर फिरतो,
तसा आळशी आपल्या अंथरुणावर लोळतो,
१५ आळशी आपला हात ताटांत घालितो,
तो परत तोंडाकडे नेण्यास त्याला श्रम वाटतात.
१६ योग्य उत्तर देणाऱ्या सात जणांपेक्षां
आळशी आपणाला शहाणा समजतो.
१७ दुसऱ्याच्या तंट्यांत पडून संतप्त होणारा,

सहज जवळून जाणाऱ्या कुत्र्याचे कान धरून
ओढणाऱ्यासारखा होय.
१८-१९ जो आपल्या शेजाऱ्याला फसवितो आणि
म्हणतो कीं
मी थट्टा नव्हतों का करीत ?
तो कोलतें, बाण व मारक शस्त्रें फेकणाऱ्या
वेड्यासारखा आहे.
२० सर्पण नसल्यामुळें विस्तव विझतो;
कानाशीं लागणारा कोणी नसला म्हणजे
तंटा मिटतो.
२१ निखाऱ्यांस जसे कोळसे, विस्तवाला जसें सर्पण,
तसा भांडण पेटविण्यास भांडखोर लागतो.
२२ कानीं लागणाऱ्याचे शब्द रुचकर
पक्वान्नासारखे असतात,
ते पोटांत अगदीं खोल शिरतात.
२३ वाणी कळवळ्याची पण मन दुष्ट असणें हें,
रुप्याचा मुलामा दिलेल्या मडक्यासारखें होय.
२४ द्वेष्टा आपल्या वाणीनें खोटा बहाणा करितो,
पण अंतर्यामीं कपट बाळगितो;
२५ तो गोडगोड बोलतो तेव्हां त्याच्यावर विश्वास
ठेवूं नको,
कारण त्याच्या हृदयांत सात विषें आहेत;
२६ त्याचा द्वेष धूर्ततेनें झांकला आहे,
तरी लोकसमाजापुढें त्याची दुष्टता
उघडकीस येईल.
२७ जो खाच खणतो तो तींत पडेल,
जो धोंडा लोटितो त्याजवर तो उलट येईल.
२८ लबाड जिव्हा आपण घायाळ केलेल्यांचा द्वेष करिते,
खुशामत करणारें तोंड नाशाला कारण होतें.

२७

१ उद्यांची खात्री मानूं नको,
कारण एका दिवसांत काय होईल हें तुला
कळत नाहीं.
२ स्वमुखानें नव्हे, तर इतरांनीं,
आपल्या तोंडानें नव्हे तर परक्यांनीं
तुझी प्रशंसा करावी.
३ दगड जड असतो व वाळू वजनानें भारी असते,
पण मूर्खाचा राग ह्या दोहोंहून भारी असतो.
४ क्रोधाची निष्ठुरता व कोपाचा तडाखा हीं पुरवलीं,
पण प्रेमसंशयापुढें कोण टिकेल ?
५ झाकलेल्या प्रेमापेक्षां,
उघड शब्दताडण बरें.
६ मित्रानें केलेले घाय खऱ्या प्रेमाचे आहेत,
पण वैरी चुंबनांची गर्दी उडवितो.
७ धालेल्या जिवाला मधाचा वीट येतो,
पण भुकेल्या जिवाला कोणतीहि कडू वस्तु
गोड लागते.
८ स्वस्थान सोडून भ्रमण करणारा मनुष्य
आपलें कोटें सोडून भटकणाऱ्या पक्ष्यासारखा आहे.
९ तेल व सुगंधी द्रव्यें मनाला आल्हाद देतात,
त्याप्रमाणें मनापासून मसलत देणाऱ्या मित्राचें
माधुर्य होय.
१० स्वतःच्या व आपल्या बापाच्या मित्राला सोडूं नको;
आपल्या संकटसमयीं भावाच्या दारीं जाऊं नको;
दूर असलेल्या आपल्या भावापेक्षां जवळ असलेला
शेजारी बरा.
११ माझ्या मुला, सुज्ञ होऊन माझें मन आनंदित कर,
म्हणजे माझी निंदा करणाऱ्यास मी प्रत्युत्तर देईन.
१२ चतुर मनुष्य अरिष्ट येत आहे असें पाहून लपतो,
पण भोळे पुढें जातात आणि हानि पावतात.
१३ अनोळख्याला जो जामीन होतो त्याचें वस्त्र ठेवून घे;
जो परस्त्रीला जामीन होतो त्याला
तारणादाखल ठेव.
१४ कोणी मोठ्या पहाटेस उठून उंच स्वरानें आपल्या
मित्रास आशीर्वाद दिला
तर तो त्याला शाप होय असें मानितील.
१५ पावसाच्या झडीच्या दिवशीं सतत गळते टिपके,
व कटकटी बायको हीं सारखीं आहेत;
१६ तिला आवरणारा म्हणजे वाऱ्याला
आवरणारा होय;
त्याच्या उजव्या हाताला तेल लागल्यासारखें होतें.

१७ तिखें तिख्याला पाणीदार करितें,
तसा मनुष्य आपल्या मित्राचा चेहरा
पाणीदार करितो.
१८ जो अंजिराचें झाड राखितो तो त्याचें फळ खातो;
जो आपल्या धन्याच्या सेवेला जपतो त्याचा
मान होतो.
१९ जसें पाण्यांत मुखाचें प्रतिबिंब हुबेहूब दिसतें
तशीं मनुष्याचीं हृदयें परस्परांचीं प्रतिबिंबें होत.
२० अधोलोक व विनाशस्थान हीं कधीं
तृप्त होत नाहींत;
आणि मनुष्याचे नेत्रहि कधीं तृप्त होत नाहींत.
२१ रुप्यासाठीं मूस व सोन्यासाठीं भट्टी,
तशी मनुष्यासाठीं प्रशंसेची कसोटी होय.
२२ कुटलेल्या धान्याबरोबर मूर्खाला उखळांत घालून
मुसळानें कुटलें,
तरी त्याची मूर्खता त्याला सोडणार नाहीं.

२३ तूं आपल्या शेरडांमेंढरांची स्थिति पाहत जा;
आपल्या कळपांवर चांगली नजर ठेव;
२४ कारण संपत्ति सदा टिकत नाहीं;
राजमुकुट तरी पिढ्यानपिढ्या टिकेल काय ?
२५ वाळलेलें गवत जाऊन त्या जागीं कोवळें
गवत उगवतें,
डोंगरांवरील हिरवळ कापून गोळा करितात.
२६ वस्त्रांसाठीं कोकरें आहेत;
बकरीं शेताचें मोल आहेत;
२७ तुझ्या व तुझ्या घराण्याच्या अन्नापुरतें,
आणि तुझ्या दासींच्या पोषणापुरतें शेळ्यांचें दूध
तुझ्याजवळ आहे.

## २८

१ कोणी पाठीस लागलें नसतां
दुर्जन पळतात,
पण धार्मिक सिंहासारखे निर्भय राहतात.
२ देशाच्या पातकामुळें त्याचे बहुत अधिपति होतात,
पण समंजस व जाणत्या मनुष्यांच्या हातून त्याची
सुस्थिति दीर्घ काळ राहते.
३ दुबळ्यांस पीडणारा दरिद्री पुरुष,
हा धुऊन नेणाऱ्या व अन्न राहूं न देणाऱ्या
पावसासारखा आहे.
४ शास्त्राज्ञा मोडणारे दुर्जनांची प्रशंसा करितात,
पण धर्मशास्त्र पाळणारे त्यांजवर संतापतात.
५ दुर्जनांला न्याय समजत नाहीं,
पण परमेश्वराला शरण जाणाऱ्यांना
सर्व कांहीं समजतें.
६ धनवान् असून जो दुटप्पी मनाचा आहे,
त्याच्यापेक्षां सात्त्विकपणें चालणारा दरिद्री बरा.
७ सुज्ञ पुत्र धर्मशास्त्र पाळितो,
पण खादाडांचा सोबती आपल्या बापास
खालीं पाहावयास लावितो.
८ जो आपलें धन वाढीदिढीनें वाढवितो,
तो तें गरिबांवर दया करणाऱ्यासाठीं सांठवितो.
९ धर्मशास्त्र कानीं पडूं नये म्हणून जो आपला
कान फिरवितो,
त्याची प्रार्थना देखील वीट आणणारी आहे.
१० जो सरळांस बहकवून कुमार्गास लावितो
तो आपण खणिलेल्या खाचेंत स्वतः पडेल;
पण सात्त्विक कल्याणरूप वतन पावतील.
११ धनवान् आपल्या मतें शहाणा असतो,
पण समंजस गरीब त्याचा भेद बाहेर काढितो.
१२ धार्मिकांचा विजय होतो तेव्हां मोठा उत्सव होतो,
पण दुर्जन प्रबल झाले असतां लोक लपून बसतात.
१३ जो आपले दोष झाकितो त्याचें बरें होत नाहीं;
जो ते कबूल करून सोडून देतो त्याजवर दया होते.
१४ जो नेहमीं पापभीरु असतो तो धन्य,
पण जो आपलें मन कठीण करितो
तो विपत्तींत पडतो.
१५ गरीब प्रजेवरचा दुष्ट अधिपति
गर्जणाऱ्या सिंहासारखा
आणि भक्ष्य शोधीत फिरणाऱ्या
अस्वलासारखा आहे.

१६ ज्या अधिपतीला बुद्धि कमी त्याचा जुलूम फार,
ज्याला लोभीपणाचा तिटकारा वाटतो तो
दीर्घायुषी होतो.
१७ रक्तपाताच्या दोषाचा ज्याला भार झाला आहे,
तो शवगर्तेकडे धावतो; त्याला धरूं नको.
१८ सरळ मार्गानें चालणाऱ्याचा बचाव होतो,
पण दुटप्पी मनाच्या मनुष्याचा अचानक
अधःपात होतो,
१९ जो आपलें शेत आपण करितो त्याला भरपूर
अन्न मिळतें,
जो गर्विष्ठांच्या मागें लागतो त्याला पुरें दारिद्य येतें.
२० स्थिर मनाच्या मनुष्याला आशीर्वादांची
रेलचेल होते;
पण जो धनवान् होण्याची उतावळी करितो त्याला
शिक्षा झाल्यावांचून राहत नाहीं.
२१ तोंड पाहून वागणें बरें नाहीं,
चतकोर भाकरीसाठींहि मनुष्य गुन्हा करील.
२२ दुष्ट दृष्टीचा मनुष्य धन मिळविण्याची
उतावळी करितो,
आपणास दारिद्य येईल हें त्याला समजत नाहीं.
२३ जिव्हेनें खुशामत करणाऱ्यापेक्षां
वाग्दंड करणाऱ्याचे आभार अंतीं मानितात.
२४ जो आईबापांस लुटितो आणि म्हणतो कीं ह्यांत
कांहीं गुन्हा नाहीं,
तो घातपात करणाऱ्याचा सोबती होय.
२५ लोभी मनुष्य तंटा उपस्थित करितो;
पण परमेश्वरावर भाव ठेवणारा धष्टपुष्ट होतो.
२६ जो आपल्या मनावर भरवसा ठेवितो तो मूर्ख,
पण जो सुज्ञतेनें चालतो त्याचा बचाव होतो.
२७ जो दरिद्यांस देतो त्याला कांहीं उणें पडत नाहीं,
पण जो त्यांविषयीं डोळेझाक करितो त्याला शापां-
वर शाप मिळतात.
२८ दुर्जन प्रबल झाले असतां लोक लपून बसतात,
त्यांचा नायनाट झाला म्हणजे धार्मिक वृद्धि
पावतात.

## २९

१ पुष्कळदां वाग्दंड झाला असूनहि जो
आपली मान ताठ करितो
त्याचा अचानक चुराडा होतो, त्याचा कांहीं
उपाय चालत नाहीं.
२ धार्मिक बढती पावतात तेव्हां लोक आनंद पावतात,
पण दुर्जन प्रभुत्व चालवितो तेव्हां प्रजा
हायहाय करिते.
३ ज्या मनुष्याला ज्ञानाची आवड असते तो आपल्या
बापाला आनंदित करितो,
पण वेश्यांची संगत धरणारा आपल्या मालमत्तेची
धूळधाण करितो.
४ राजा न्यायानें देश सुस्थितींत ठेवितो,
पण नजराणे घेणारा त्याचें वाटोळें करितो.
५ जो आपल्या शेजाऱ्याची खुशामत करितो
तो त्याच्या पावलांसाठीं जाळें पसरितो,
६ दुर्जनाचें पाप पाशरूप आहे,
पण धार्मिक स्तवन करून उल्लासतो.
७ धार्मिक गरिबांच्या वादांत मन घालितो;
दुर्जनास तो समजण्याची बुद्धि नसते.
८ उद्दामपणा करणारे नगराला आग लावून देतात,
पण सुज्ञ जन क्रोधाला घालवितात.
९ सुज्ञाचा मूर्खाशीं वाद असला तर मूर्ख रागावो
किंवा हसो, त्याला स्वस्थता म्हणून नसतेच.
१० खुनशी मनुष्यें सात्विकाचा द्वेष करितात,
पण सरळ मनुष्यें त्याच्या जिवाला जपतात.
११ मूर्ख आपल्या मनांतील सर्व क्रोध व्यक्त करितो,
पण सुज्ञ तो मागें आवरून ठेवितो.
१२ अधिपति खोट्या गोष्टीला कान देणारा असला,
तर त्याचे सर्व सेवक दुष्ट बनतात.
१३ गरीब व सावकार यांचा व्यवहार होतो;
या दोघांस प्रकाश देणारा परमेश्वर आहे.
१४ जो राजा गरिबांचा खरेपणानें न्याय करितो,
त्याचें सिंहासन सदा टिकतें.
१५ छडी व वाग्दंड ज्ञान देतात,
पण मोकळें सोडिलेलें पोर आपल्या आईला

खालीं पाहावयास लागतें.
१६ दुर्जन वाढती पावले म्हणजे गुन्हे वाढतात,
धार्मिकांला त्यांचें पतन पाहावयास सांपडतें.
१७ तूं आपल्या मुलास शासन कर, म्हणजे तो तुला स्वास्थ्य देईल,
तो तुझ्या जिवाला हर्ष देईल.
१८ ईश्वरी दृष्टांत न झाल्यास लोक अनावर होतात,
पण धर्मशास्त्र पाळितो तो धन्य.
१९ चाकर शब्दांनीं सुधारत नाहीं;
त्याला समजतें तरी तो पर्वा करीत नाहीं.
२० बोलण्यांत उतावळा असा कोणी तुला दिसतो काय ?
त्याच्यापेक्षां मूर्खाविषयीं अधिक आशा असते.
२१ कोणीं आपल्या चाकरास बाळपणापासून लाडानें वाढविलें,
तर तो शेवटीं मुलगाच होऊन बसेल.
२२ रागीट मनुष्य तंटा उपस्थित करतो,
क्रोधाविष्ट मनुष्याकडून बहुत अपराध घडतात.
२३ गर्व मनुष्याला खालीं उतरितो,
पण ज्याचें चित्त नम्र तो सन्मान पावतो.
२४ चोराचा भागीदार आपल्या आत्म्याचा द्वेष्टा होय;
तो शपथ ऐकतो तरी तो कांहीं सांगत नाहीं.
२५ मनुष्याची भीति पाशरूप होते;
पण जो परमेश्वरावर भाव ठेवितो त्याचें संरक्षण होतें.
२६ अधिपतीची मर्जी संपादण्यास पुष्कळ लोक झटतात;
पण मनुष्याचा निवाडा करणारा परमेश्वर आहे.
२७ कुटिल मनुष्याचा धार्मिकांला वीट वाटतो,
आणि सरळमार्गी मनुष्याचा दुर्जनाला वीट वाटतो.

३० १ याकेचा पुत्र आगूर याचीं वचनें म्हणजे देववाणी :
त्या पुरुषानें म्हटलें, हे देवा, मी स्वतः कष्टी आहें;
हे देवा, मीं स्वतांला कष्ट दिले आहेत, मी क्षीण झालों आहें;
२ मला मनुष्य म्हणूं नये इतका मी मूढ आहें,
मनुष्यांत समज असतो तो माझ्यांत नाहीं.
३ परमपवित्राचें ज्ञान मला व्हावें
इतकें सुज्ञान मी शिकलों नाहीं.
४ आकाशांत चढून कोण उतरला आहे ?
वायु आपल्या ओंजळींत कोणीं धरून ठेविला आहे ?
जलाशय वस्त्रांत कोणीं बांधून ठेविला आहे ?
पृथ्वीच्या सर्व सीमा कोणीं स्थापिल्या आहेत ?
त्याचें नांव काय ? त्याच्या पुत्राचें नांव काय ?
तुला ठाऊक असल्यास सांग.
५ ईश्वराचें प्रत्येक वचन शुद्ध आहे;
त्याचा आश्रय करणाऱ्यांची तो ढाल आहे.
६ त्याच्या वचनांत तूं कांहीं भर घालूं नको,
घालिशील तर तो तुझा दोष उघड करील आणि तूं लबाड ठरशील.
७ मी तुजजवळ दोन वर मागतों;
मी मरण्यापूर्वी ते मला दे, नाहीं म्हणूं नको;
८ व्यर्थ अभिमान व लबाडी मजपासून दूर राख;
दारिद्र्य किंवा श्रीमंती मला देऊं नको;
मला आवश्यक तेवढें अन्न खावयास दे.
९ माझी अतितृप्ति झाल्यास मी कदाचित् तुझा अव्हेर करीन,
आणि परमेश्वर कोण आहे, असें म्हणेन;
मी दरिद्री राहिल्यास कदाचित् चोरी करीन,
आणि माझ्या देवाच्या नामाची निंदा करीन.
१० चाकराची चुगली त्याच्या धन्याजवळ करूं नको;
करशील तर तो तुला शिव्याशाप देईल आणि तूं अपराधी ठरशील.
११ बापाला शाप देणारा व तुला आशीर्वाद प्राप्त होवो असें आईला न म्हणणारा
अशा लोकांचा एक वर्ग आहे.
१२ आपला मळ धुतलेला नसतां

१ अथवा : कृतघ्न

आपल्या मतें स्वतःला शुद्ध समजणारा
असा एक वर्ग आहे.
१३ ज्याची दृष्टि किती तरी उंच,
व ज्याच्या पापण्या वर चढलेल्या आहेत
असा एक वर्ग आहे.
१४ पृथ्वीवरून गरीब व मनुष्यांपैकीं कंगाल यांस खाऊन नाहींतसे करावे,
असे तरवारींसारखे ज्यांचे दांत व सुऱ्यांसारख्या ज्यांच्या दाढा,
असा एक वर्ग आहे.
१५ जळवेच्या दोन कन्या आहेत,
त्या दे दे असें ओरडत असतात;
कधीं तृप्त होत नाहींत अशा तीन वस्तु आहेत;
पुरे म्हणून कधीं म्हणत नाहींत अशा चार वस्तु आहेत;
१६ त्या ह्या: अधोलोक, वांझेचें उदर,
पाण्यानें कधीं पोट भरत नाहीं अशी पृथ्वी,
पुरे म्हणून कधीं न म्हणणारा अग्नि.
१७ जो डोळा बापाची थट्टा करितो,
आईचें ऐकणें तुच्छ मानतो
त्याला खोऱ्यांतले डोमकावळे बोंचून बाहेर काढितील,
त्याला गिधाडांचीं पिलें खाऊन टाकितील.
१८ तीन गोष्टी माझ्या समजापलीकडे आहेत,
चार मला कळत नाहींत:
१९ गरुडाचें आकाशांत उडणें,
सर्पाचें खडकावर सरपटणें,
जहाजाचें समुद्रावर चालणें,
व पुरुषाचा तरुणीशीं संबंध.
२० जारिणीचा रिवाज असा असतो:
ती खाऊन पिऊन तोंड पुसते
आणि म्हणते, मीं कांहीं दुष्कर्म केलें नाहीं.
२१ तीन गोष्टींनीं भूमि कंपित होते,
चारींचा भार तिला सहन होत नाहीं;
२२ त्या ह्या: राजा झालेला दास,
अन्नानें तुडुंब पोट भरलेला मूर्ख,
२३ लग्न झालेली त्रासदायक स्त्री,
व धनिणीची वारस झालेली दासी.
२४ लहान व अत्यंत शहाणे
असे चार प्राणी पृथ्वीवर आहेत:
२५ मुंग्या ह्या प्राणिवर्गांत अशक्त आहेत,
तरी उन्हाळ्यांत त्या आपलें अन्न सांठवून ठेवितात.
२६ ससे हे सशक्त प्राणी नाहींत,
तरी ते खडकांत आपलीं बिळें करितात;
२७ टोळांस कोणी राजा नाहीं,
तरी ते टोळ्या करून एकदम उडतात.
२८ पाल हातानें धरितां येते;
तरी ती राजमहालांत असते.
२९ चांगल्या पावलांचे तीन प्राणी आहेत,
चौघांची चाल सुरेख आहे;
३० ते हे: सर्व वनपशूंत बलवान्
व कोणासहि पाठ न दाखविणारा सिंह;
३१ कसलेला शिकारी कुत्रा,
बोकड व सैन्याधीश राजा.
३२ तूं गर्वानें ताठ होण्याचें मूर्खत्व केलें,
अथवा मनांत दुष्कर्म योजिलें,
तर तूं आपल्या मुखावर हात ठेव.
३३ दूध घुसळिल्यानें लोणी निघतें,
नाक पिळिल्यानें रक्त निघतें,
तसा राग चेतविल्यानें तंटा उपस्थित होतो.

३१ १ लमुएल राजाचीं वचनें म्हणजे त्याच्या आईनें त्याला शिकविलेली देववाणी:
२ माझ्या मुला, मी काय सांगूं?
माझ्या पोटच्या मुला, मी काय सांगूं?
माझ्या नवसाच्या मुला, मी काय सांगूं?
३ तूं आपलें वीर्य स्त्रियांस देऊं नको;
आपलें मन राजांचा नाश करणाऱ्यास वश होऊं देऊं नको.

४ हे लमुएला, द्राक्षारस पिणें राजांस शोभत नाहीं,
राजांस तें नाहीं शोभत;
मद्य कोठें आहे असें विचारणें
सरदारांस शोभत नाहीं.
५ तें ते प्याले तर धर्मशास्त्र विसरून
पीडलेल्यांचा न्याय विपरीत करितील.
६ मरणाच्या लागास आलेल्यास मद्य दे,
खिन्न मनाच्या मनुष्यास द्राक्षारस दे.
७ त्यानें तें पिऊन आपली विपत्ति विसरावी,
त्याच्या हालांचें त्याला विस्मरण व्हावें.
८ मुक्यांच्या वतीनें, आसन्नमरण झालेल्यांच्या वतीनें
आपलें तोंड उघड.
९ आपलें मुख उघड, धर्मानें न्याय कर;
गरीब व कंगाल यांस न्याय मिळूं दे.

१० सद्गुणी स्त्री कोणाला प्राप्त होते ?
तिचें मोल मोत्यांहून अधिक आहे.
११ तिच्या पतीचें मन तिजवर भरवसा ठेवितें;
त्याला संपत्तीची वाण पडत नाहीं.
१२ ती आमरण त्याचें हित करिते,
अहित करीत नाहीं.
१३ ती लोकर व ताग खटपटीनें मिळवितें,
आणि आनंदानें आपल्या हातांनीं काम करिते.
१४ ती व्यापारी गलबतांसारखी आहे.
ती आपली अन्नसामग्री दुरून आणिते.
१५ रात्र सरली नाहीं तोंच ती उठून
कुटुंबाच्या अन्नसामग्रीची व्यवस्था करिते,
आणि आपल्या दासींस त्यांचा अन्नाचा वांटा देते.
१६ शेताची चौकशी करून तें ती विकत घेते;
ती आपल्या हातच्या कमाईनें द्राक्षांचा मळा लाविते.
१७ ती बळरूप पट्ट्यानें आपली कंबर बांधिते;
ती आपले बाहु नेटानें कामास लाविते.
१८ आपला उद्योग फायदेशीर आहे हें तिला कळतें.
तिचा दिवा रात्रीस मालवत नाहीं.
१९ ती चाती आपल्या हातीं घेते,
ती हातांनीं चरकी धरिते.
२० ती गरिबांसाठीं मूठ उघडिते
गरजवंतांस हात देते.
२१ आपल्या कुटुंबाकरितां तिला बर्फाचें
भय वाटत नाहीं,
कारण तिचें सर्व कुटुंब किरमिजी बनात
पांघरलेलें असतें.
२२ ती आपणासाठीं वेलबुट्टीदार पलंगपोस करिते,
तिचें वस्त्र तलम तागाचें व जांभळें आहे.
२३ तिचा पती वेशींत देशाच्या वडील मंडळींत बसला
असतां तेव्हांच ओळखितां येतो.
२४ ती तागाचीं वस्त्रें करून विकिते,
व्यापाऱ्यांस कमरबंद विकत देते.
२५ बल व प्रताप हींच तिचीं वस्त्रें आहेत,
ती पुढील काळाविषयीं निश्चिंत राहते.
२६ तिच्या तोंडांतून सुज्ञतेचे बोल निघतात,
तिच्या जिव्हेच्या ठायीं दयेचें शिक्षण असतें.
२७ ती आपल्या कुटुंबाच्या आचारविचारांकडे लक्ष देते,
ती आळशी बसून अन्न खात नाहीं.
२८ तिचीं मुलें उठून तिला धन्य म्हणतात,
तिचा नवराहि उठून तिची प्रशंसा करून म्हणतो:
२९ बहुत स्त्रियांनीं सद्गुण दाखविले आहेत,
पण तूं त्या सर्वांहून वरचढ आहेस.
३० सौंदर्य भुलविणारें आहे व लावण्य व्यर्थ आहे,
परमेश्वराचें भय बाळगणाऱ्या स्त्रीची प्रशंसा होते,
३१ तिच्या हातांचें श्रमफल तिला लाभूं द्या,
तिच्या कृत्यांनीं भर वेशींत तिची प्रशंसा होवो.

# उपदेशक



१ १ यरुशलेमांतील राजा दावीदपुत्र, उपदेशक,
याचीं वचनें :
२ व्यर्थ हो व्यर्थ ! असें उपदेशक म्हणतो;
व्यर्थ हो व्यर्थ ! सर्व कांहीं व्यर्थ. ३ या भूतलावर
मनुष्य जे सर्व परिश्रम करितो त्यांत त्याला काय लाभ ?
४ एक पिढी जाते व दुसरी येते; पृथ्वीच कायती सदा
कायम राहते. ५ सूर्य उदय पावून अस्तास जातो
आणि तेथून आपल्या उदयस्थानाकडे धाव घेतो.
६ वायु दक्षिण दिशेकडे वाहतो व उलटून उत्तर
दिशेकडे वाहतो; तो एकसारखा घुमत जाऊन पुन:पुन:
आपली फेरी करितो. ७ सर्व नद्या सागराला जाऊन
मिळतात तरी सागर भरून जात नाहीं; ज्या स्थलीं त्या
जाऊन मिळतात तेथेंच त्या पुनःपुनः वाहत राहतात.
८ सर्व कांहीं कष्टमय आहे; कोणालाहि त्याचें वर्णन
करितां येत नाहीं; तें पाहून डोळ्याची तृप्ति होत नाहीं,
ऐकून कानाचें समाधान होत नाहीं. ९ एकदा होऊन
गेलें तेंच होणार; करण्यांत आलें तेंच करण्यांत येणार;
भूतलावर नवें म्हणून कांहींच नाहीं; १० हें पाहा,
कांहीं नवीन आहे, असें एखाद्या गोष्टीविषयीं कोणीं
म्हटल्यास ती आपल्यापूर्वी युगांतरीं होऊन गेलेली
असते. ११ मागल्यांचें स्मरण राहिलें नाहीं; पुढें जे
होतील त्यांचेंहि स्मरण त्यांच्या पुढल्यांस राहणार नाहीं.
१२ मी, उपदेशक, यरुशलेमांत इस्राएलांचा राजा
होतों. १३ ह्या भूतलावर जे कांहीं व्यापार चालले
असतात त्यांचा नीट शोध करून ज्ञानाच्या योगानें
त्यांचें रहस्य पाहण्याकडे मीं आपलें चित्त लाविलें. देवानें
मनुष्यांच्या मागें बिकट कष्ट लावून दिले आहेत.
१४ ह्या भूतलावर जीं कांहीं कामें चालत असतात तीं
मीं पाहिलीं; तों पाहा, हा सर्व व्यर्थ, वायफळ उद्योग होय.
१५ जें वांकडें आहे तें सरळ होत नाहीं; जें उणें
आहे तें जमेस धरितां येत नाहीं. १६ मी आपल्या
मनाशीं म्हणालों, माझ्यापूर्वी जितके राजे यरुशलेमावर
होऊन गेले तितक्यांहून अधिक ज्ञान मीं प्राप्त करून
घेतलें आहे; ज्ञान व विद्या यांची पूर्ण प्रतीति माझ्या
मनाला घडली आहे. १७ ज्ञान काय आणि वेडेपण व
मूर्खपण हीं काय हें जाणण्याकडे मीं आपलें चित्त
लाविलें, तों मला असें दिसून आलें कीं हाहि वायफळ
उद्योग होय. १८ कारण जेथें ज्ञान फार तेथें खेदहि
फार; ज्याला विद्या अधिक त्याला दुःखहि अधिक.

२ १ मग मीं आपल्या मनांत म्हटलें, चल,
हास्यविनोदानें मी तुला अजमावून पाहतों; तर
आतां तूं सुख भोगून घे; पण हेंहि व्यर्थ. २ मीं
हास्यास म्हटलें, तूं वेडें आहेस; मीं विनोदास म्हटलें,
तुजपासून काय लाभ ? ३ मानवपुत्रांनीं आपल्या
साऱ्या आयुष्यांत ह्या भूतलावर काय केलें असतां त्यांचें
हित होईल याचा निर्णय समजावा म्हणून विवेकानें
माझ्या मनाचें संयमन करून द्राक्षारसानें माझ्या
शरीराची चैन कशी होईल आणि मूर्खपणाच्या आचारांचें
अवलंबन कसें करितां येईल याचा मीं आपल्या मनाशीं
शोध केला. ४ मीं मोठमोठीं कामें हातीं घेतलीं,
आपल्यासाठीं घरेंदारें बांधिलीं, द्राक्षीचे मळे लाविले;
५ मीं आपल्यासाठीं बागा व त्यांत हरतऱ्हेचीं फळझाडें
लावविलीं; ६ वृक्षांची लागवड केलेल्या वनास पाण्याचा
पुरवठा करावा म्हणून मीं तलाव करविले; ७ मीं दास-
दासी खरेदी केल्या; माझ्या घरांत जन्मलेले दास माझे
झाले होते; खिल्लारें व कळप यांचें मोठें धन मजजवळ
होतें, तेवढें माझ्यापूर्वी यरुशलेमांत कोणाजवळ नव्हतें.

१ अथवा : संशयवादी.

२ मुळांत : सूर्याखालतीं.

२ मुळांत : सूर्याखालतीं.

८ मीं सोन्यारुप्याचा आणि राजांजवळ असणाऱ्या देशोदेशींच्या बहुमूल्य पदार्थांचा संचय केला; स्वतांसाठीं गाणारे व गाणारणी मिळविल्या आणि मानवपुत्रांस रंजविणाऱ्या अशा बहुत उपस्त्रिया मीं ठेविल्या. ९ असा मी थोर झालों; माझ्यापूर्वी यरुशलेमांत जे होऊन गेले त्यांच्यापेक्षां मी थोर झालों तरी माझा विवेक कायम होता. १० माझे नेत्र ज्याची म्हणून वांच्छा करीत तें मीं त्यांच्यापासून वेगळें केलें नाहीं; मीं कोणत्याहि आनंदाच्या विषयापासून आपलें मन आवरिलें नाहीं; कारण ह्या सर्व खटाटोपाचा माझ्या मनास आल्हाद होत असे; ह्या सर्व खटाटोपापासून माझ्या वांट्यास एवढेंच आलें. ११ मग मीं आपल्या हातानें केलेलीं सर्व कामें आणि परिश्रम ह्यांचें निरीक्षण केलें; तों पाहा, सर्व कांहीं व्यर्थ व वायफळ उद्योग होय; भूतलावर हित असें कशांतच नाहीं.

१२ मग पाहा, ज्ञान, वेडेपण व मूर्खपण यांकडे मीं लक्ष पुरविलें; कारण राजाच्या मागून येणाऱ्या पुरुषाच्या हातून काय होणार? आजवर लोक जें करीत आले तेंच तो करणार. १३ मग माझ्या नजरेस आलें कीं अंधकारापेक्षां प्रकाश जसा श्रेष्ठ तसें मूर्खतेपेक्षां ज्ञान श्रेष्ठ. १४ ज्ञान्याचे नेत्र त्याच्या मस्तकांत असतात; आणि मूर्ख अंधकारांत चालतो; असें असून सर्वांची गति एकच आहे असें माझ्या लक्षांत आलें. १५ मग मीं आपल्या मनांत म्हटलें, मूर्खाची जी गति तीच माझी, तर मी एवढा ज्ञानी झालों तरी कशाला? मीं आपल्या मनांत म्हटलें, हेंहि व्यर्थच! १६ मूर्खाप्रमाणेंच ज्ञान्याची आठवण सदा राहणार नाहीं, कारण पुढें येणाऱ्या काळीं सर्वांचें विस्मरण होणार आहे. तर पाहा, ज्ञानी कसा मरण पावतो तर मूर्खाप्रमाणेंच! १७ यावरून जीविताचा मला वीट आला; कारण ह्या भूतलावर जे कांहीं मानवी व्यवहार होतात ते मला अनुचित वाटले; एकूण सर्व कांहीं व्यर्थ व वायफळ उद्योग आहे.

१८ माझ्या सर्व श्रमांचें फळ माझ्या मागून येणाऱ्याला ठेवून मला जावें लागणार आहे, हें लक्षांत येऊन मीं या भूतलावर जे कांहीं परिश्रम केले त्या सगळ्यांचा मला वीट आला. १९ तो सुज्ञ निपेल कीं मूर्ख निपेल हें कोणास ठाऊक? तरी जें कांहीं मीं परिश्रम करून व शहाणपण खर्चून ह्या भूतलावर संपादिलें आहे त्यावर तो ताबा चालविणार; हेंहि व्यर्थच! २० यास्तव ह्या भूतलावर जे कांहीं परिश्रम मी करीत होतों ते मीं सोडून दिले; आणि माझें मन हताश झालें. २१ कोणीं सुज्ञता, ज्ञान व चतुराई यांनीं परिश्रम करून कांहीं संपादावें, आणि त्यासाठीं ज्यानें परिश्रम केले नाहींत त्याच्या वांट्यास तें ठेवून सोडून जावें; हेंहि व्यर्थ व मोठें अनिष्ट होय. २२ मनुष्य जे कांहीं परिश्रम करितो व आपला जीव उलथापालथा करून या भूतलावर खटाटोप करितो त्याचा त्याला काय लाभ? २३ त्याचे सर्व दिवस दुःखमय असतात; त्याची दगदग कष्टमय असते; रात्रींहि त्याच्या मनास चैन नसतें; हेंहि व्यर्थच!

२४ मनुष्यानें खावें, प्यावें व श्रम करून आपल्या जिवास सुख द्यावें यापेक्षां त्याला कांहींहि इष्ट नाहीं; हेंहि देवाच्या हातून मिळतें असें माझ्या ध्यानांत आलें. २५ कारण त्याच्या प्रसादावांचून खाणेंपिणें व सुख भोगणें हीं कोणास प्राप्त होणार? २६ जो देवाच्या दृष्टीनें चांगला त्यास तो बुद्धि, ज्ञान व सुख हीं देतो; धन मिळवून सांठविण्याचे कष्ट देव पाप्यावर लादितो, अशासाठीं कीं देवाच्या दृष्टीनें जो चांगला त्यास तें द्यावें; हाहि व्यर्थ व वायफळ उद्योग होय.

३ १ सर्वांचा कांहीं उचित काळ म्हणून असतो; भूतलावरील प्रत्येक कार्याला समय असतो. २ जन्मसमय व मृत्युसमय, रोपण्याचा समय व रोपलेलें उपटण्याचा समय असतो; ३ वधण्याचा समय व बरें करण्याचा समय, मोडून टाकण्याचा समय व बांधून काढण्याचा समय असतो; ४ रडण्याचा समय व हसण्याचा समय, शोक करण्याचा समय व नृत्य करण्याचा समय असतो; ५ धोंडे फेंकून देण्याचा समय व धोंडे गोळा करण्याचा समय, आलिंगन देण्याचा समय व आलिंगन देण्याचें आंवरून धरण्याचा समय असतो; ६ शोधण्याचा समय व गमावण्याचा समय, राखून ठेवण्याचा समय व टाकून देण्याचा समय असतो; ७ फाडून टाकण्याचा समय व शिवण्याचा समय, मौन

धरण्याचा समय व बोलण्याचा समय असतो; ८ प्रेम
करण्याचा समय व द्वेष करण्याचा समय, युद्ध करण्याचा
समय व सख्य करण्याचा समय असतो. ९ मनुष्य ज्या-
साठीं कष्ट करितो त्यांत त्याला काय लाभ ? १० मानव-
जातीस जे कष्ट देव भोगावयास लावीत असतो ते
मीं पाहिले आहेत. ११ आपआपल्या समयीं होणारी
हरएक वस्तु त्यानें सुंदर बनविली आहे; त्यानें मनुष्याच्या
मनांत अनंतकालाविषयींची कल्पना उत्पन्न केली आहे;
तरी देवाचा आदिपासून अंतापर्यंतचा कार्यक्रम
मनुष्याला उमगत नाहीं. १२ मनुष्यांनीं आमरण सुखानें
राहावें व हित साधावें यापरतें इष्ट त्यांस कांहीं नाहीं
हें मला कळून आलें आहे. १३ तरी प्रत्येक मनुष्यानें
खावें, प्यावें व आपला सर्व उद्योग करून सुख मिळवावें
हीहि देवाची देणगी आहे. १४ मला हें देखील समजून
आलें कीं देव जें कांहीं करितो तें सर्वकाळ राहणार;
तें अधिक करितां येत नाहीं व उणें करितां येत नाहीं;
मनुष्यानें त्याचें भय धरावें म्हणून देव असा क्रम चाल-
वितो. १५ जें कांहीं होत आहे तें पूर्वीच होऊन चुकलें
आहे; आणि जें होणार आहे तें आधींच होऊन
चुकलें आहे; आणि देव गत गोष्टी पुनः आपल्यापुढें
आणितो.

१६ आणखी ह्या भूतलावर न्यायाचें स्थान पाहावें
तर तेथें दुष्टता आहे; धर्माचें स्थान पाहावें तर तेथें
दुराचार आहे. १७ मीं आपल्या मनांत म्हटलें, देव
धार्मिकांचा आणि दुष्टांचा न्याय करील; कारण हरएक
गोष्टीचा व हरएक कामाचा नेमिलेला समय आहे.
१८ मीं आपल्या मनांत म्हटलें, देव हें असें मानवपुत्रां-
करितां करितो, तें ह्या हेतूनें कीं त्यांला कसोटीस लावावें
आणि आपण केवळ पशु आहों हें त्यांस कळून यावें.
१९ मानवपुत्रांवर प्रसंग येतात तसेच पशूंवरहि येतात;
दोघांवरहि एकच प्रसंग येतो; हा मरतो तसाच तोहि
मरतो; त्या सर्वांचा प्राण सारखाच आहे; पशूंपेक्षां
मनुष्य कांहीं श्रेष्ठ नाहीं; कारण सर्व कांहीं व्यर्थ आहे!
२० सर्व एकाच स्थानीं जातात; सर्वांची उत्पत्ति माती-
पासून आहे व सर्व पुनः मातीस मिळतात. २१ मानव-
जातीचा प्राण वर जातो आणि पशुजातीचा प्राण खालीं
*जमिनींत जातो कीं काय हें कोणास ठाऊक?* २२ त्यावरून
मीं असा विचार केला कीं मनुष्यानें आपले व्यवसाय
करून सुख मिळवावें, यापरतें इष्ट त्याला कांहीं नाहीं.
त्याच्या वांट्यास एवढेंच आहे; त्याच्या मागें जें कांहीं
होणार तें त्यानें पाहावें म्हणून त्याला परत कोण आणील?

४ १ मग ह्या भूतलावर चालू असलेल्या सर्व
जुलमांचें मीं फिरून पर्यालोचन केलें; तों पाहा,
गांजलेल्यांचे अश्रु गळत आहेत, पण त्यांचें सांत्वन
करणारा कोणी नाहीं; त्यांजवर जुलूम करणाऱ्यांच्या
ठायीं बळ आहे, पण गांजलेल्यांचें सांत्वन करणारा
कोणी नाहीं; २ म्हणून जे जीवंत जन अद्यापि हयात
आहेत त्यांपेक्षां जे मृतजन मरून गेले आहेत त्यांस
मीं बरें म्हटलें. ३ जो अजून उत्पन्न झाला नाहीं, ज्यानें
ह्या भूतलावर घडणारीं दुष्कर्में पाहिलीं नाहींत, त्याची
दशा ह्या दोघांपेक्षांहि बरी.

४ मग मीं सर्व उद्योग व कारागिरी हीं पाहिलीं;
हीं सर्व चढाओढीमुळें होतात; हाहि व्यर्थ व वायफळ
उद्योग होय. ५ मूर्ख हात पांघरून बसतो व आपल्याच
देहाचा नाश करून घेतो. ६ कष्टानें व वायफळ
उद्योगानें भरलेल्या दोन मुठींपेक्षां शांतीनें भरलेली
एक मूठ पुरवली.

७ मग मीं फिरून भूतलावरील व्यर्थ गोष्टी पाहिल्या.
८ कोणी एकटाच असून त्याला दुसरा कोणी नाहीं;
त्याला पुत्र किंवा बंधु नाहीं; तरी त्याच्या कष्टाला अंत
नाहीं, व धनानें त्याच्या नेत्रांची तृप्ति होत नाहीं. तो
म्हणतो मी हे श्रम करितों व माझ्या जिवाचें सुख
दवडितों, हें कोणासाठीं? हेंहि व्यर्थ, कष्टमय होय.
९ एकट्यापेक्षां दोघे बरे; कारण त्यांच्या श्रमांचें
त्यांना चांगलें फळ प्राप्त होतें. १० त्यांतला एक
पडला तर त्याचा सोबती त्याला हात देईल; पण जो
एकटा असून पडतो त्याला हात देण्यास कोणी नसतें;
त्याची दुर्दशा होते. ११ दोघे एकत्र निजले तर त्यांस
ऊब येते; एकट्याला ऊब कशी येईल? १२ जो

१ **मुळांत** : आपलें मांस खातो.

एकटा असतो त्याला कोणी माणूस भारी झाला तर त्याचा प्रतिकार दोघांला करितां येईल; तीनपदरी दोरी सहसा तुटत नाहीं.

१३ अधिकाधिक बोध ग्रहण करण्याचें कळत नाहीं अशा वृद्ध पण मूढ राजापेक्षां गरीब पण शहाणा तरुण बरा. १४ कारण हा कारागृहांतून निघून राजा झाला; पण तो आपल्या राज्यांत जरी जन्मला तरी कंगाल झाला. १५ हा जो दुसरा तरुण पहिल्याच्या जागीं आला त्याच्या पक्षाचे भूतलावरील सगळे लोक होते असें माझ्या नजरेस आलें. १६ ज्यांचा तो अधिपति झाला ते अगणित होते; तरी पुढील काळचे लोक त्याजविषयीं आनंद पावणार नाहींत. निःसंशय हीहि व्यर्थ व वायफळ उद्योग होय.

५ १ तूं देवाच्या मंदिरीं जातोस तेव्हां संभाळून पाऊल टाक; बोध श्रवण करण्यास समीप जाणें हें मूर्खांच्या बलिहवनापेक्षां बरें; आपण अधर्म करितों हें त्यांस कळत नाहीं. २ बोलण्याची घाई करूं नको; देवासमोर कोणताहि उद्गार तोंडावाटे काढण्यास आपलें मन उतावळें करूं नको; कारण देव स्वर्गांत आहे आणि तूं तर पृथ्वीवर आहेस; म्हणून तुझें बोलणें अल्प असावें. ३ काम फार पडल्यानें त्याचें स्वप्न पडतें; तशीच फार वाचालतेनें मूर्खाची वाणी प्रगट होते. ४ तूं देवाला नवस केला असल्यास तो फेडण्यास विलंब करूं नको; कारण देव मूर्खांवर प्रसन्न होत नसतो; जो नवस तूं केला असेल त्याची फेड कर. ५ नवस करावा आणि तो फेडूं नये यापेक्षां तो मुळींच न करणें बरें. ६ तुझ्या तोंडामुळें तुझ्या देहाला शासन होऊं देऊं नको. मी चुकून बोललों असें दिव्यदूतासमोर म्हणूं नको; तुझ्या बोलण्याचा देवाला राग येऊन त्यानें तुझ्या हातचीं कामें नष्ट कां करावीं? ७ बहुत स्वप्नें पाहणें व बहुत भाषण करणें ह्या वायफळ गोष्टी होत; पण तूं देवाचें भय धर.

८ एकाद्या प्रांतांत दुर्बलांवर जुलूम होत आहे, न्याय व धर्म यांची पायमल्ली होत आहे, असें तूं पाहिलें तर त्यामुळें चकित होऊं नको; कारण वरिष्ठ माणसावर त्याच्याहूनहि वरिष्ठांची नजर असते आणि त्यांच्यावरहि कोणी वरिष्ठ असतो. ९ शेतींत मन घालणारा राजा देशाच्या कल्याणास सर्वस्वीं कारण होतो.

१० ज्याला पैसा प्रिय वाटतो त्याची पैशानें तृप्ति होत नाहीं; जो विपुल धनाचा लोभ धरितो त्याला कांहीं लाभ घडत नाहीं; हेंहि व्यर्थ! ११ संपत्ति वाढली म्हणजे तिचा उपभोग घेणारेहि वाढतात; डोळ्यांनीं पाहण्यापलीकडे तिचा मालकाला काय लाभ होतो? १२ कष्ट करणारा थोडें खावो कीं फार खावो, त्याची निद्रा गोड असते; पण धनिकाची धनाढ्यता त्याला झोप येऊं देत नाहीं.

१३ धनिक धन राखून ठेवितो तें त्याच्या हानीला कारण होतें; हें एक मोठें अनिष्ट भूतलावर माझ्या दृष्टीस पडलें आहे; १४ त्याचें तें धन एकाद्या अनिष्ट प्रसंगामुळें विलयास जातें; आणि त्याला पुत्र झाला असतां त्याच्या हातीं कांहीं येत नाहीं. १५ तो मातेच्या उदरांतून निघाला तसाच नग्न परत जाईल, आपल्या श्रमांचें कांहींहि फळ आपल्याबरोबर घेऊन जाणार नाहीं. १६ तो जसा आला तसाच सर्वतोपरी परत जाईल, हेंहि एक मोठें अनिष्ट आहे; त्यानें वायफळ उद्योग केला त्याचा त्याला काय लाभ? १७ तो सर्व आयुष्यभर अंधारांत अन्न खातो; त्यास बहुत खेद, रोग व संताप हीं होतात.

१८ मला जें बरें व मनोरम दिसून आलें तें हें: मनुष्यानें खावें, प्यावें व ह्या भूतलावर जे श्रम तो करितो त्या सर्वांत देवानें त्यास दिलेल्या आयुष्यभर सुख भोगावें; कारण एवढेंच त्याच्या वांट्यास आहे. १९ कोणास देवानें धनसंपत्ति दिली असेल, तिचा उपभोग घेण्याची, आपला वांटा उचलण्याची व परिश्रम करितांना आनंद पावण्याची शक्ति दिली असेल, तर ही देवाची देणगीच समजावी. २० त्याला आपल्या आयुष्याच्या दिवसांची फारशी चिंता वाटणार नाहीं; देव त्याच्या मनाच्या आनंदास अनुकूल असतो.

६ १ मीं भूतलावर एक अनिष्ट पाहिलें; तें
मनुष्यावर मोठ्या बोजासारखें असतें. २ तें हें : कोणा
मनुष्यास देव धनसंपत्ति व प्रतिष्ठा हीं एवढीं देतो
कीं त्याला सगळें कांहीं मनसोक्त मिळतें, कांहीं कमी पडत
नाहीं; तरी देव त्याला तें भोगूं देत नाहीं, तें परकाच
भोगितो; हेंहि व्यर्थ व एक मोठी विकृतिच होय.
३ कोणा मनुष्यास शंभर मुलें झालीं व तो बहुत वर्षे
जगला, त्याच्या आयुष्याची वर्षसंख्या मोठी असली,
तरी त्याचा जीव सुखप्राप्तीनें समाधान पावला नाहीं,
त्याचें उत्तरकार्य झालें नाहीं, तर अशा मनुष्यापेक्षां
मृतपिंड पुरवला, असें मी म्हणतों; ४ कारण तो
शून्यावस्थेंत येतो व अंधकारांत नाहींसा होतो;
त्याचें नांव अंधकारानें व्याप्त राहतें; ५ त्याप्रमाणेंच
सूर्य त्याला दिसला नाहीं कीं कळला नाहीं; म्हणून
त्याला त्या दुसऱ्या मनुष्यापेक्षां अधिक शांति प्राप्त होते.
६ हजारांच्या दुप्पट वर्षे जगूनहि त्यानें कांहीं सुख
भोगिलें नाहीं तर त्यांत काय अर्थ? सर्व एकाच
स्थानीं जातात ना?

७ मनुष्याचा सर्व परिश्रम पोटासाठीं आहे, तरी
त्याच्या जिवाची तृप्ति म्हणून होत नाहीं. ८ मूर्खापेक्षां
शहाण्याला काय अधिक लाभ होतो? त्याप्रमाणेंच जो
दीन असून लोकांत कसें वागावें हें जाणतो त्याला तरी
काय लाभ? ९ मन इकडेतिकडे धावूं देण्यापेक्षां तुझ्या
दृष्टीसमोर असलेल्या गोष्टींत सुख मानणें बरें; हाहि व्यर्थ
व वायफळ उद्योग होय.

१० जें कांहीं झालें आहे त्याला पूर्वीच नांव दिलें
होतें; मनुष्याचें काय होणार हेंहि पूर्वीच माहीत असतें;
त्याजहून जो समर्थ त्याच्याशीं त्याला झगडतां येणार
नाहीं. ११ व्यर्थतेची वृद्धि करणाऱ्या अशा बहुत गोष्टी
आहेत; त्यांपासून मनुष्याला काय लाभ? १२ मनुष्य
आपल्या निरर्थक आयुष्याचे छायारूप दिवस घालवितो,
त्यांत त्याला काय लाभ होतो तें कोणास ठाऊक?
मनुष्याच्या पश्चात् भूतलावर काय होईल हें त्याला
कोणाच्यानें सांगवेल?

७ १ सुवासिक अत्तरापेक्षां नांवलौकिक बरा;
जन्मदिनापेक्षां मृत्युदिन बरा. २ भोजनोत्सवगृहीं
जाण्यापेक्षां शोकगृहीं जाणें बरें; कारण प्रत्येक
मनुष्याचा शेवट हाच आहे; जीवंताच्या मनांत ही
गोष्ट बिंबून राहील. ३ हसण्यापेक्षां खेद करणें बरें;
मुद्रा खिन्न असल्यानें मन सुधारतें. ४ शहाण्यांचें चित्त
शोकगृहाकडे लागतें; पण मूर्खांचें चित्त हास्यविनोद-
गृहाकडे लागतें.

५ मूर्खांचें गायन ऐकण्यापेक्षां शहाण्याची निषेधवाणी
ऐकणें बरें. ६ कारण मूर्खांचें हास्य हांड्याखालीं
जळणाऱ्या काट्याकुट्यांच्या कडकडण्यासारखें असतें;
हेंहि व्यर्थ होय. ७ जुलूम केल्यानें शहाणा वेडा बनतो;
लांच खाल्यानें बुद्धीला भ्रंश होतो.

८ एकाद्या गोष्टीच्या आरंभापेक्षां तिचा शेवट बरा;
उन्मत्त मनाच्या इसमापेक्षां सहनशील मनाचा इसम बरा.
९ मन उतावळें होऊं देऊन रागावूं नको; कारण राग
मूर्खांच्या हृदयांत वसतो. १० सांप्रतच्यापेक्षां पूर्वीचे
दिवस बरे होते, हें कां? असें म्हणूं नको; हें तुझें
विचारणें शहाणपणाचें नव्हे.

११ वतनाबरोबर शहाणपण असल्यास बरें; भूतलावर
जन्म पावलेल्यांस[1] तें विशेष हिताचह आहे. १२ ज्ञान
आश्रय देणारें आहे व पैसाहि आश्रय देणारा आहे; तरी
ज्ञानापासून असा लाभ होतो कीं ज्याच्यापाशीं शहाणपण
असतें त्याच्या जीविताचें तें रक्षण करितें. १३ देवाची
करणी पाहा, त्यानें जें वांकडें केलें आहे तें कोणाच्यानें
सरळ करवेल? १४ संपत्कालीं आनंद कर; विपत्कालीं
विवेकानें वाग; कारण मनुष्याच्या मागें काय होईल
हें त्यास कळूं नये म्हणून देवानें सुखदुःखें शेजारीं
शेजारीं ठेविलीं आहेत.

१५ एकादा धार्मिक मनुष्य धर्माचरण करीत
असतो तरी तो नष्ट होतो; आणि एकादा दुष्ट
मनुष्य अधर्माचरण करीत असतांहि दीर्घायु होतो;
हें सर्व मीं आपल्या व्यर्थ गेलेल्या दिवसांत पाहिलें
आहे. १६ फाजील धार्मिक होऊं नको; मर्यादेबाहेर
शहाणपणा मिरवूं नको; तूं आपला नाश कां करून
घ्यावा? १७ दुष्टतेचा अतिरेक करूं नको; मूर्ख होऊं
नको; तूं अकालीं कां मरावें? १८ याला तूं धरून
राहावें, आणि त्यापासून तूं आपला हात मागें घेऊं
नये हें बरें; कारण जो देवाचें भय धरितो तो या

[1] मुळांत : सूर्यदर्शन घडलेल्यांस.

सर्वांतून पार पडेल.

१९ नगरांतल्या दहा अधिपतींपेक्षां अधिक चांगलें रक्षण शहाणपण शहाण्याचें करितें. २० सदाचारानें वागणारा व पाप न करणारा असा धार्मिक पुरुष पृथ्वीवर आढळणार नाहीं. २१ बोललेल्या सर्व शब्दांकडे लक्ष देऊं नको, देशील तर कदाचित् तूं आपल्या चाकराला तुला शिव्याशाप देतांना ऐकशील; २२ कारण तूंहि इतरांस वारंवार शिव्याशाप दिले हें तुझ्या मनास ठाऊक आहे.

२३ मीं ह्या सर्व गोष्टी विवेकानें अजमावून पाहिल्या आहेत; आपण ज्ञानसंपन्न व्हावें असें मला वाटलें, पण तें मजपासून दूरच राहिलें. २४ जें आहे तें दूर व अत्यंत गूढ आहे; त्याचा थांग कोणास लागणार? २५ ज्ञान व विवेक हीं समजून घेऊन त्यांचें रहस्य जाणावें व त्यांचा शोध लावावा, आणि दुष्टता केवळ मूर्खत्व आहे व मूर्खत्व केवळ वेडगळपणा आहे, हें समजावें म्हणून मीं फिरून आपलें चित्त ह्या गोष्टींकडे लाविलें. २६ मला मृत्यूहूनहि दुःखदायी अशी एक वस्तु आढळली, ती पाशरूप झालेली स्त्री होय; तिचें हृदय केवळ पारध्याचें जाळें आहे; तिचे हात शृंखला आहेत; जो पुरुष देवाला प्रिय असतो तोच तिच्या हातून सुटतो; पापी तिच्या तावडींत सांपडतो. २७ उपदेशक म्हणतो, हिशोब पाहावा म्हणून एकंदर गोळाबेरीज करितां मला आढळून आलें तें हें; २८ पण मी आजवर धुंडाळीत आहें तरी मला आढळलें नाहीं तें हें: हजारांत एक पुरुष मला आढळला, पण तेवढ्या स्त्रियांत मला एकहि स्त्री आढळली नाहीं. २९ पाहा, एवढेंच मला आढळलें कीं देवानें मनुष्य सरळ असा उत्पन्न केला आहे, पण तो अनेक कल्पनांच्या मागें लागला आहे.

८ १ ज्ञानी पुरुषासमान कोण आहे? कोणत्याहि गोष्टीचा उलगडा करण्याचें कोणाला समजतें? ज्ञान मनुष्याचें मुख तेजस्वी करितें; तेणेंकरून त्याच्या मुखाचा उद्धटपणा पालटतो. २ मी म्हणतों कीं राजाची आज्ञा पाळ; तूं देवाची शपथ घेतली आहे म्हणून ती पाळ. ३ त्याला सोडून जाण्याची घाई करूं नको; दुष्ट मसलतींत शिरूं नको; कारण त्याला आवडेल तें तो करितो. ४ राजाचा शब्द तर प्रबळ असतो; तूं हें काय करितोस, असें त्याला कोण म्हणेल? ५ जो आज्ञा पाळितो तो अनिष्ट पाहणार नाहीं; नेमिलेला काळ व न्यायसमय हे ज्ञान्याच्या मनाला अवगत होतील; ६ प्रत्येक गोष्टीला नेमिलेला काळ व न्यायसमय असतो, कारण मनुष्याची दुर्दशा मनस्वी असते; ७ पुढें काय होणार हें त्याला ठाऊक नसतें; कसें काय होणार हें त्याला कोण सांगेल? ८ प्राणावर कोणा मनुष्याची अशी सत्ता नसते कीं तो त्याला जाऊं देणार नाहीं; मरणदिवस कोणाच्या स्वाधीन नाहीं; ह्या संग्राम कोणाला सुटणार नाहीं. दुष्कर्म आपल्या मालकाचा बचाव करीत नाहीं. ९ हें सर्व मीं पाहिलें आहे; भूतलावर चालू असलेल्या सर्व कृत्यांकडे मीं आपलें चित्त लाविलें आहे; एक मनुष्य दुसऱ्यावर सत्ता चालवून त्याचें नुकसान करितो.

१० त्या वेळीं माझ्या नजरेस असें आलें की दुष्टांला मूठमाती मिळून ते विराम पावतात; धर्मानें वागणाऱ्यांस पवित्रस्थान सोडून जावें लागतें, आणि नगरांतील लोक त्यांस विसरून जातात; हेंहि व्यर्थ. ११ दुष्कर्माबद्दल शिक्षा तत्काळ होत नाहीं म्हणून मानवपुत्रांचें मन दुष्कर्म करण्याकडे प्रवृत्त होतें. १२ पापी शंभरदा पाप करून पुष्कळ दिवस वांचला तरी माझी खात्री आहे कीं देवाचें भय बाळगणारे जे त्यास भिऊन वागतात त्यांचें कल्याणच होईल; १३ पण दुष्टाचें कल्याण होणार नाहीं, व त्याचें छायारूप आयुष्य दीर्घ असणार नाहीं; कारण तो देवाला भिऊन वागत नाहीं.

१४ पृथ्वीवर आणखी एक व्यर्थ गोष्ट घडते: असे कांहीं धार्मिक लोक असतात कीं दुष्टांच्या करणीमुळें त्यांची जी स्थिति व्हावी ती यांची होते; आणि असे कांहीं दुर्जन असतात कीं धार्मिकांच्या करणीमुळें त्यांची जी स्थिति व्हावी ती यांची होते; हेंहि व्यर्थ!

१ अथवा: संशयवादी

असें मीं म्हटलें. १५ मग मी हास्यविनोदाची प्रशंसा करून म्हणालों, ह्या भूतलावर मनुष्यानें खावें, प्यावें व चैन करावी यापेक्षां इष्ट त्याला कांहीं नाहीं; देवानें त्याला या भूतलावर जो आयुष्यकाल दिला आहे त्यांत श्रम करीत असतां एवढेंच त्याच्याबरोबर राहणार.

१६ मग ज्ञानाची ओळख करून घेण्याकडे व पृथ्वीवर चालू असलेला उद्योग पाहण्याकडे मीं आपलें चित्त लाविलें; कारण अहोरात्र ज्यांचा डोळ्यास डोळा लागत नाहीं असेहि लोक असतात. १७ मग मीं देवाच्या सर्व करणीकडे लक्ष दिलें तों असें दिसून आलें कीं भूतलावर जो कांहीं उद्योग चालला आहे त्याचें तत्त्व मनुष्याला कळत नाहीं; शिवाय मनुष्यानें परिश्रम करून त्याचा शोध केला तरी त्याचा थांग लागत नाहीं; ज्ञानी पुरुष म्हणेल कीं मी तें शोधून काढीन, तर त्यालाहि त्याचा थांग लागावयाचा नाहीं. १ ह्या सगळ्यांचें

९ मनन मीं केलें आणि हें स्पष्टपणें समजण्याचा प्रयत्न केला; तें हें कीं धार्मिक व ज्ञानी आणि त्यांचीं कृत्यें हीं सर्व देवाच्या स्वाधीन आहेत; आपण प्रेम करणार कीं वैर करणार हें मनुष्यास कळत नाहीं; हें सर्व कांहीं त्याला पुढें प्राप्त होणार असतें.

२ जें कांहीं घडतें तें सर्वांस सारखेंच घडतें; धार्मिक व दुष्ट, सात्त्विक, शुद्ध व अशुद्ध, यज्ञ करणारा व यज्ञ न करणारा ह्या सर्वांची एकच गति होते; सात्त्विकाची व पाप्याची, शपथ वाहणाऱ्याची, तसीच शपथ वाहण्यास भिणाऱ्याची सारखीच दशा होते. ३ भूतलावर जें कांहीं घडतें त्या सर्वांत हें एक अनिष्ट आहे कीं सर्वांची सारखीच गति होते; मानवपुत्रांच्या मनांत दुष्टता भरलेली असते, त्यांचें मन जन्मभर भ्रांतिमय असतें, मग ते मेलेल्यांस जाऊन मिळतात. ४ जो जीवसृष्टीशीं मिळून असतो त्याला आशा असते, कारण मृत सिंहापेक्षां जीवंत श्वान बरा. ५ आपणांस मरावयाचें आहे हें जीवंताला निदान कळत असतें; पण मृतांस तर कांहींच कळत नाहीं; त्यांस आणखी कांहीं फलप्राप्ति व्हावयाची नसते; त्यांचें स्मरण कोणास राहत नाहीं. ६ त्यांचें प्रेम, त्यांचें वैर व त्यांचा हेवादेवा हीं नष्ट होऊन गेलीं आहेत; ह्या भूतलावरील व्यवहारांत त्यांचा भाग कधींहि असणार नाहीं.

७ जा, तूं आनंदानें आपली भाकर खा; हर्षभरानें आपला द्राक्षारस पी; कारण देवाचा तुझ्या कृत्यांवर प्रसाद झाला आहे. ८ तुझीं वस्त्रें सदा शुभ्र असोत; तुझ्या डोक्याला तेलाची वाण नसो. ९ देवानें ह्या भूतलावर तुझ्या व्यर्थ आयुष्याचे जे दिवस नेमिले आहेत ते तुझे सर्व व्यर्थ दिवस आपल्या प्रिय स्त्रीबरोबर सुखानें घालीव; आयुष्यांत हा तुझा वांटा आहे; ह्या भूतलावर जे परिश्रम तूं करितोस त्यांचें हें फळ तुला आहे. १० जें कांहीं काम तुझ्या हातीं पडेल तें आपलें सगळें सामर्थ्य खर्चून कर; कारण ज्या अधोलोकाकडे तूं जावयाचा आहेस तेथें कांहीं उद्योग, युक्तिप्रयुक्ति, बुद्धि व ज्ञान यांचें नांव नाहीं.

११ मीं परत येऊन भूतलावर आणखी पाहिलें तों वेगवानांसच शर्यतींत यश व वीरांसच युद्धांत विजयश्री मिळते असें नाहीं; शहाण्यांलाच अन्न व समंजसांलाच धन मिळतें आणि ज्ञात्यांवरच अनुग्रह होतो असें नाहीं; तर सर्व कालवश व दैववश आहेत. १२ कारण मनुष्याला स्वतांवर येणारा प्रसंग कळत नाहीं; अपायकारक जाळ्यांत सांपडणाऱ्या माशांप्रमाणें, पाशांत अडकणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें, मानवपुत्रांवर अनिष्ट कालपाश अकस्मात् पडतो; त्यांत ते सांपडतात.

१३ मीं भूतलावर पुढील प्रकारचें ज्ञान पाहिलें, तें मला फार थोर भासलें; तें असें : १४ एक लहानसें नगर होतें, त्यांत थोडेच लोक होते; त्यावर एका मोठ्या राजानें चढाई करून त्यास वेढा दिला व त्याच्यासमोर मोठाले मोरचे लाविले. १५ त्यांत एक गरीब पण बुद्धिमान् मनुष्य होता; त्यानें आपल्या बुद्धिबलानें त्या नगराचा बचाव केला; पण त्या गरीब मनुष्याचें स्मरणहि कोणाला राहिलें नाहीं. १६ तेव्हां मी म्हणालों, बलाहून ज्ञान श्रेष्ठ खरें; तथापि गरिबाची अक्कल लोक तुच्छ मानितात आणि त्याचे शब्द ऐकत नाहींत.

१७ मूर्खांच्या राजानें केलेल्या ओरडीपेक्षां शांतपणें ऐकलेले शहाण्यांचे शब्द बरे. १८ युद्धशस्त्रांपेक्षां ज्ञान

श्रेष्ठ आहे; एकटा पापी बहुत हिताची नासाडी
**१०** करितो. १ गंध्याच्या तेलास, मरून पडलेल्या माशांमुळें दुर्गंधि येते व तें नासून जातें, तसा अल्पमात्र मूर्खपणाचा पगडा अक्कल व प्रतिष्ठा यांवर बसतो. २ शहाण्याचें मन उजवीकडे पण मूर्खाचें मन डावीकडे असतें. ३ मूर्ख आपल्या बुद्धीशीं फारकत करून वाटेनें चालला असतां तो ज्याला त्याला म्हणतो, तूं मूर्ख आहेस. ४ तुजवर अधिपतीचा क्रोध झाला तर आपली जागा सोडूं नको, कारण शांतीनें मोठमोठीं पापकर्में टळतात.

५ भूतलावर मीं एक अनिष्ट पाहिलें, तें अधिपतीच्या चुकीनें होतें असें मला दिसलें; ६ तें हें कीं मूर्खत्व अति प्रतिष्ठित स्थानीं स्थापीत होतें, आणि श्रीमंतांस नीच स्थानीं बसावें लागतें. ७ चाकर घोड्यांवर बसतांना व सरदार चाकराप्रमाणें जमिनीवर पायीं चालतांना मीं पाहिलें.

८ जो खाडा खणितो तोच त्यांत पडतो; जो कुंपण तोडितो त्याला सर्प डसतो. ९ धोंडे फोडणाऱ्याला त्यांपासून इजा होते; लाकडें तोडणारा त्यामुळें धोक्यांत येतो. १० लोखंडी हत्यार बोथटलें व त्याला धार लाविली नाहीं तर अधिक जोर लावावा लागतो. कार्यसिद्धीस ज्ञान उपयोगाचें आहे. ११ सर्पावर मंत्रप्रयोग होण्यापूर्वी तो डसला तर पुढें मांत्रिकांचा कांहीं उपयोग नाहीं.

१२ शहाण्याच्या तोंडचे शब्द अनुग्रहपर असतात; पण मूर्खाचें तोंड त्यालाच ग्रासतें. १३ त्याच्या तोंडच्या शब्दांच्या आरंभीं मूर्खपणा व त्याच्या भाषणाच्या अंतीं अपायकारक वेडेपणा असतो. १४ मूर्ख फार वाचाळपणा करितो, परंतु पुढें काय होणार हें मनुष्याला ठाऊक नसतें; त्याच्यामागें काय होणार हें त्याला कोणाच्यानें सांगवेल? १५ मूर्ख श्रम करून करून थकतो, पण त्याला शहराची वाट देखील उमगत नसते.

१६ हे देशा, तुझा राजा अल्पवयी असला व तुझे सरदार प्रातःकाळीं उठून खातपीत बसले तर तुझी दुर्दशा केवढी! १७ हे देशा, तुझा राजा कुलीन घराण्यांतला असला व तुझे सरदार निशेसाठीं नव्हे तर बलप्राप्तीसाठीं योग्य वेळीं भोजन करीत असले तर तूं धन्य! १८ आळसानें घराचें छप्पर खालीं येतें; हाताच्या सुस्तीनें घर गळतें. १९ ख्यालीखुशालीसाठीं मेजवानी करितात; द्राक्षारस जिवास उल्लास देतो; पैशानें सर्व कांहीं साध्य होतें. २० तूं आपल्या मनांतहि राजाला शाप देऊं नको; आपल्या निजावयाच्या खोलींत सुद्धां श्रीमंतास शिव्याशाप देऊं नको; कारण अंतराळांतलें पांखरूं तुझे शब्द घेऊन उडून जाईल; पक्षी तुझी गोष्ट प्रगट करील.

१ आपलें अन्न जलाशयावर सोड; तें बहुत
**११** दिवसांनीं तुझ्या हातीं येईल. २ तूं सातआठ जणांस वांटा दे; कारण पृथ्वीवर काय अनिष्ट प्रसंग येईल तें तुला ठाऊक नाहीं. ३ मेघ जलपूर्ण झाले म्हणजे ते पृथ्वीवर रिचवतात; झाड दक्षिणेकडे पडो कीं उत्तरेकडे पडो, तें पडेल त्याच ठिकाणीं राहणार. ४ जो वारा पाहत राहतो तो पेरणी करणार नाहीं; जो मेघांचा रंग पाहत बसतो तो कापणी करणार नाहीं. ५ वाऱ्याची गति कशी असते, गर्भवती स्त्रीच्या गर्भाशयांत हाडें कशीं बनतात हें तुला कळत नाहीं; तसेंच सर्व कांहीं घडविणाऱ्या देवाची कृति तुला कळत नाहीं. ६ सकाळीं आपलें बीं पेर, संध्याकाळींहि आपला हात आवरूं नको; कारण त्यांतून कोणतें फळास येईल, हें किंवा तें; अथवा दोन्ही मिळून चांगलीं होतील, हें तुला ठाऊक नसतें. ७ प्रकाश खरोखर मनोहर असतो; सूर्यदर्शन नेत्रांस रम्य असतें. ८ मनुष्य कितीहि वर्षें जगला तरी तीं त्यानें आनंदानें घालवावीं; अंधकाराचे दिवस बहुत असणार हें तो मनांत वागवो; जें प्राप्त होणार तें सर्व व्यर्थच आहे!

९ हे तरुणा, आपल्या तारुण्यांत आनंद कर; तुझ्या तारुण्याच्या दिवसांत तुझें हृदय तुला उल्लास देवो; तूं मनास वाटेल त्या मार्गानें व नजरेस येईल तसा चाल; पण ह्या सर्वांबद्दल देव तुझा झाडा घेईल हें तुझ्या लक्षांत असूं दे. १० यास्तव आपल्या मनांतून खेद दूर कर आणि आपला देह उपद्रवापासून राख; कारण तारुण्य
व भरज्वानी हीं व्यर्थ आहेत. १ आपल्या
**१२** तारुण्याच्या दिवसांत आपल्या निर्माणकर्त्याला[1]
स्मर; पाहा, अनिष्ट दिवस येत आहेत, आणि अशीं वर्षें जवळ येत आहेत कीं त्यांत मला कांहीं सुख

१ अथवा : आत्म्याची

नाहीं असें तूं म्हणशील. २ त्या समयीं सूर्य, प्रकाश, चंद्र व तारे अंधक होतील; आणि पावसानंतर अभ्रें पुनः येतील. ३ त्या काळीं घराचे रखवालदार कांपतील; बळकट पुरुष वांकतील; दळणाऱ्या थोड्या उरल्यामुळें त्यांचें काम बंद पडेल; खिडक्यांतून पाहणाऱ्या अंध होतील. ४ जात्याचा आवाज मंद झाला म्हणजे बाहेरलीं दारें मिटतील; पक्ष्याच्या शब्दानें देखील त्याच्या निद्रेचा भंग होईल; सर्व गायनस्वरें मंदावतील. ५ ते चढावाला भितील; रस्ता धोक्यांनीं भरला आहे असें त्यांस वाटेल; बदाम फुलेल; टोळसुद्धां जड असा वाटेल; वासना निमेल; कारण मनुष्य आपल्या अनंतकालिक निजधामास चालला आहे, आणि ऊर बडवून रडणारे गल्ल्यागल्ल्यांतून फिरतील. ६ मग चांदीचा दोर तुटेल; सोन्याचा कटोरा फुटेल; झऱ्याजवळचा घडा फुटेल; आडावरचा रहाट मोडेल. ७ तेव्हां माती पूर्ववत् मातीस मिळेल; आणि देवानें दिलेला आत्मा त्याजकडे परत जाईल.

१ मुळांत : गायनकन्या

८ व्यर्थ हो व्यर्थ! उपदेशक म्हणतो; सर्व कांहीं व्यर्थ!

९ उपदेशक ज्ञानी असून तो लोकांला ज्ञान शिकवीत गेला; त्यानें विचार व शोध करून पुष्कळ बोधवचनें रचलीं. १० सरळ लिहिलेलीं सत्य व मनोहर वचनें शोधण्याचा उपदेशकानें प्रयत्न केला आहे.

११ ज्ञान्यांचीं वचनें पराण्यांसारखीं असतात; सभापतींचे बोल घट्ट ठोकलेल्या खिळ्यांप्रमाणें असतात; एकाच मेंढपाळापासून तीं प्राप्त झालीं आहेत. १२ ह्याखेरीज, माझ्या पुत्रा, असा बोध घे कीं ग्रंथरचनेला कांहीं अंत नाहीं; बहुत ग्रंथपठण देहास शिणवितें.

१३ आतां सर्व कांहीं तुम्हीं ऐकलें; सर्वांचें सार हें कीं देवाचें भय धर व त्याच्या आज्ञा पाळ; मनुष्यकर्तव्य कायतें एवढेंच आहे. १४ सगळ्या बऱ्यावाईट गुप्त गोष्टींचा न्याय करितांना देव सगळ्या कृत्यांची झाडाझडती घेईल.

१ अथवा : संशयवादी

# गीतरत्न



१ शलमोनानें रचिलेलें गीतरत्न.
२ तो मला मुखचुंबन देवो;
१ तुझें प्रेम द्राक्षारसाहून
मधुर आहे.
३ तुझ्या सुवासिक अत्तराचा घमघमाट सुटतो;
तुझें नांव सिंचन केलेलें सुगंधी अत्तरच होय;
म्हणूनच कुमारी तुजवर प्रेम करितात.
४ माझ्या चित्ताचें आकर्षण कर, म्हणजे आम्ही
तुझ्यामागून धावत येऊं.
राजानें मला अंतःपुरीं आणिलें आहे.
आम्ही तुझ्याठायीं आनंदोत्सव करूं;
तुझें प्रेम द्राक्षारसाहून अधिक वर्णूं;
त्या एकनिष्ठपणें तुजवर प्रीति करीत आहेत.

५ यरुशलेमनिवासी कन्यांनो,
मी काळीसावळी पण सुरूप आहें.
केदारच्या तंबूसारखी,
शलमोनाच्या पडद्यांसारखी मी काळी आहें
६ मी काळीसावळी आहें हें मनांत
आणूं नका,
कारण मी उन्हानें होरपळलें आहें.
माझे सहोदर बंधु मजवर संतप्त झाले;

त्यांनीं मला द्राक्षीच्या मळ्यांची राखण
करावयास ठेविलें;
पण माझ्या स्वतांच्या मळ्याची राखण
मीं केली नाहीं.

७ माझ्या प्राणसख्या, मला सांग:
तूं आपला कळप कोठें चारितोस?
दुपारीं तो कोठें बसवितोस?
तुझ्या सोबत्यांच्या कळपांजवळ
मीं कां भ्रमत राहावें?
८ हे परम सुंदर स्त्रिये, तुला हें ठाऊक नसेल
तर तूं त्या शेरडामेंढरांच्या पावलांमागें पाऊल
टाकून जा;
मेंढपाळांच्या राहुट्यांनजीक आपलीं करडें
चारीत राहा.
९ माझ्या सखे,
मी तुला फारोच्या रथाच्या घोडीसारखें लेखितों.
१० गोफांनीं तुझे गाल,
रत्नहारांनीं तुझा कंठ सुरेख दिसत आहे.
११ आम्ही तुजसाठीं चांदीच्या टिका लाविलेले
सोन्याचे गोफ करूं.

१२ राजा मेजाजवळ बसला असतां
माझ्या जटामांसीचा सुगंध पसरला.
१३ माझा वल्लभ माझ्या कुचद्वयामध्यें ठेविलेल्या
गंधरसाच्या पुडीसारिखा मला आहे.
१४ माझा वल्लभ मला एन-गेदी येथील
द्राक्षीच्या मळ्यांतील
मेंदीच्या पुष्पगुच्छाप्रमाणें आहे.

१५ माझ्या सखे, तूं सुंदर आहेस; अग, तूं सुंदर आहेस!
तुझे नेत्र कपोतांसारखे आहेत.

१६ माझ्या वल्लभा, तूंच सुरूप आहेस; तूंच मनोहर
आहेस;
आमचा मंचक पर्णशय्या आहे.
१७ आमच्या घराच्या तुळ्या गंधसरूच्या आहेत;
आमची तक्तपोशी सुरूची आहे.

२ १ मी शारोनाचें कुंकुमपुष्प आहें;
मी खोऱ्यांतलें भुईकमळ आहें.

२ कांटेरी झुडपांमध्यें जसें भुईकमल,
तशी इतर युवतींमध्यें माझी सखी आहे.

३ वनवृक्षांमध्यें जसें सफरचंदाचें झाड
तसा तरुणांमध्यें माझा वल्लभ.
त्याच्या छायेंत बसून मला आनंद झाला;
त्याचें फळ मला स्वादिष्ट लागलें.
४ त्यानें मला आपल्या पानगृहांत आणिलें;
त्यानें मजवर प्रेमध्वजा फडकाविली.
५ मनुकांची पोळी देऊन माझ्या जिवाला आराम द्या
सफरचंद खाऊन मला हुशारी येऊं द्या.
मी प्रेमज्वरानें पीडित झालें आहें.
६ त्याचा डावा हात माझ्या डोक्याखालीं आहे;
त्याचा उजवा हात मला आलिंगीत आहे.
७ यरुशलेमाच्या कन्यांनो,
तुम्हांस वनांतील मृगींची, हरिणींची शपथ
घालून सांगतें;
माझ्या प्रेमानंदाला व्यत्यय आणूं नका, विघ्न
आणूं नका;
तो राहील तितका वेळ राहूं द्या.

८ हा माझ्या वल्लभाचा शब्द!
पाहा तो डोंगरांवरून उड्या टाकीत, टेकड्यांवरून
दौडत येत आहे!
९ माझा वल्लभ हरिणासारिखा, मृगाच्या पाडसा
सारखा आहे;
पाहा, तो आमच्या भिंतीमागें उभा आहे;
तो खिडकींतून डोकावीत आहे;
तो झरोक्यांतून पाहत आहे.
१० माझा वल्लभ मला म्हणाला,
माझे प्रिये, माझे सुंदरी, ऊठ, चल.

११ पाहा, हिंवाळा गेला आहे;
पाऊस संपून गेला आहे;
१२ पृथ्वीवर फुलें दिसूं लागलीं आहेत;
पक्षी गाऊं लागण्याचा समय आला आहे;
आमच्या प्रांतांत होल्याचा शब्द ऐकूं येत आहे.
१३ अंजिराचीं हिरवीं फळें लाल होऊं लागलीं आहेत;
द्राक्षींस फुलवरा येऊन सुगंध सुटला आहे;
माझे प्रिये, माझे सुंदरी, ऊठ, चल ये.

१४ अगे माझे कपोते, खडकाच्या कपारींत, कड्याच्या अडोशास राहणाऱ्ये,
मला तुझें मुख पाहूं दे, तुझा शब्द मला ऐकूं दे;
कारण तुझा कंठ मधुर आहे; तुझें मुख रम्य आहे.
१५ द्राक्षींच्या मळ्यांची नासधूस करणाऱ्या खोकडांस,
त्या लहान कोल्ह्यांस आम्हांसाठीं धरा,
कारण आमचे द्राक्षीचे मळे फुलले आहेत.

१६ माझा वल्लभ माझा, व मी त्याची;
तो आपला कळप भुईकमळांत चारीत आहे.
१७ शिळोप्याची वेळ, छाया नाहींशी होण्याची वेळ, येईपर्यंत तूं फिरत राहा.
माझ्या वल्लभा, हरिणाप्रमाणें,
मृगीच्या पाडसाप्रमाणें,
वियोगपर्वतांवर फीर.

## ३

१ रात्रीं शय्येवर पडलें असतां माझ्या प्राणप्रियाच्या दर्शनाची उत्कंठा मला लागली;
मीं त्याला चोहोंकडे पाहिलें; पण तो मला आढळला नाहीं.
२ माझ्या मनांत आलें कीं आतां उठून शहरभर फिरावें,
आपल्या प्राणप्रियाचा शोध पेठांतून व गल्ल्यांतून करावा;
मीं त्याचा शोध केला पण तो मला आढळला नाहीं.
३ नगरांत फिरणारे जागल्ये मला भेटले;
मीं त्यांस विचारिलें, माझा प्राणप्रिय तुम्हांस कोठें आढळला काय?
४ त्यांस सोडून मी अंमळ पुढें जातें
तों माझा प्राणप्रिय मला भेटला;
मीं त्याला धरून ठेविलें;
मीं त्याला आपल्या मातृगृहीं,
आपल्या जननीच्या कोठडींत
आणीपर्यंत सोडिलें नाहीं.
५ यरुशलेमाच्या कन्यांनो,
तुम्हांस वनांतील मृगींची, हरिणींची शपथ घालून सांगतें,
माझ्या प्रेमानंदाला व्यत्यय आणूं नका,
विघ्न आणूं नका,
तो राहील तितका वेळ राहूं द्या.

६ गंधरस व ऊद,
सौदागराकडील एकंदर सुवासिक द्रव्यें यांच्या सुगंधानें युक्त
असें धुराच्या स्तंभांसारखें रानांतून हें येत आहे तें काय?
७ पाहा, ती शलमोनाची पालखी येत आहे;
तिच्याबरोबर साठ वीरपुरुष चालत आहेत;
ते इस्राएलाच्या वीरपुरुषांपैकीं आहेत.
८ ते सर्व खड्गधारी व युद्धप्रवीण आहेत;
रात्रीच्या समयीं प्राप्त होणाऱ्या भयास्तव
प्रत्येकाच्या कमरेस तरवार लटकत आहे.
९ शलमोन राजानें आपणासाठीं लबानोनी लाकडाची एक पालखी करविली आहे.
१० तिचे दांडे रुप्याचे आहेत;
तिची पाठ सोन्याची आहे; तिची गादी जांभळ्या रंगाची आहे;
तिचा अंतर्भाग यरुशलेमाच्या कन्यांनीं प्रेमानें विभूषित केला आहे.
११ सीयोननिवासी कन्यांनो, बाहेर या, शलमोन राजास पाहा;

त्याच्या विवाहदिवशीं, त्याच्या मनास उल्लास
झाला त्या दिवशीं,
त्याच्या मातेनें त्यास घातलेल्या मुकुटानें मंडित
झालेला, असा हा पाहा.

४

१ अहा! तूं सुंदर आहेस! माझ्या सखे, तूं
सुरूप आहेस!
तुझ्या बुरख्याच्या आंतून तुझे नेत्र कपोतां-
सारखे दिसतात;
तुझे केस गिलाद डोंगराच्या उतरणीवर बसलेल्या
शेरडांच्या कळपासारखे दिसतात.
२ लोकर कातरून धुतलेल्या मेंढ्या
जोडीजोडीनें येतात;
त्यांतल्या कोणाचीहि जोडी फुटत नसते,
त्यांच्या कळपासारखे तुझे दांत आहेत.
३ तुझे ओठ किरमिजी सूत्रासमान आहेत;
तुझें मुख रम्य आहे;
तुझ्या बुरख्यांतून तुझीं कानशिलें
डाळिंबाच्या फाकेसमान दिसतात.
४ तुझी मान दाविदानें शस्त्रागारासाठीं बांधिलेल्या
बुरुजासारखी आहे,
त्यावर सहस्र ढाली व वीरांचीं सगळीं कवचें
लटकत असतात.
५ भुईकमळांमध्यें चरणाऱ्या हरिणीच्या जुळ्या
पाडसांप्रमाणें, तुझें कुचद्वय आहे.
६ शिळोप्याची छाया नाहींशी होण्याची
वेळ येईपर्यंत
मी गंधरसाच्या पर्वतावर,
उदाच्या टेकडीवर जाऊन राहीन.
७ माझ्या प्रिये, तूं सर्वांगसुंदर आहेस;
तुझ्यांत कांहीं व्यंग नाहीं.

८ अगे माझ्या वधू! लबानोनावरून मजबरोबर,
लबानोनावरून मजबरोबर ये;
अमानाच्या माथ्यावरून,
सनीर व हर्मोन यांच्या माथ्यांवरून
सिंहांच्या गुहांतून,
चित्त्यांच्या पहाडांवरून तूं नजर फेक.
९ अगे माझे भगिनी, माझे वधू,
तूं माझें मन मोहिलें;
तुझ्या नेत्रकटाक्षानें,
तुझ्या गळ्यांतल्या लहानशा हारानें
माझें मन मोहिलें.
१० अगे माझे भगिनी, माझे वधू!
तुझें प्रेम किती मनोरम आहे!
तुझें प्रेम द्राक्षारसाहून किती तरी मधुर आहे!
तुझ्या उटण्यांचा वास सर्व प्रकारच्या सुगंधी
द्रव्यांहून मधुर आहे!
११ माझे वधू! तुझ्या ओठांतून मधु स्रवतें;
तुझ्या जिव्हेखालीं मधु व दुग्ध हीं आहेत;
तुझ्या वस्त्रांचा सुवास लबानोनाच्या
सुगंधासारिखा आहे.
१२ माझी भगिनी, माझी वधू, ही बंद असलेला बाग,
बंद असलेला निर्झर, मोहरबंद कारंजें होय.
१३ तुझ्या ठायीं सुंदर फळें देणारी डाळिंबाची वाटिका
अंकुरित झाली आहे;
मेंदी व जटामांसी,
१४ जटामांसी व केशर,
वेखंड व दालचिनी, उदाचीं सर्व प्रकारचीं झाडें
आणि गंधरस व अगरू, तशींच इतर सर्व
सुगंधी झाडें
तुझ्याठायीं आहेत.
१५ बागेंतलें कारंजें,
जीवंत झऱ्याचा कूप,
लबानोनाहून वाहून येणारे जलप्रवाह
अशी तूं आहेस.

१६ हे उत्तरवायू, जागृत हो; दक्षिणवायू, तूंहि ये;
माझ्या बागेवरून वाहा, तिचा परिमल फाकीव.

माझा वल्लभ आपल्या बागेंत येऊन
आपल्या आवडीचीं फळें सेवन करो.

५ १ हे माझे भगिनी, माझे वधू, मी आपल्या
बागेंत आलों आहें;
मीं आपला गंधरस व सुगंधी द्रव्यें
जमा केलीं आहेत;
मीं आपलें मधूनें थबथबलेलें पोळें खालें आहे;
मीं दुग्ध व द्राक्षारस हीं सेविलीं आहेत;
मित्रहो, खा,
प्रियजनहो, प्या, मनमुराद प्या.

२ मी निद्रिस्त आहें, तरी माझें मन जागृत आहे;
ऐका! माझा वल्लभ दार ठोकीत आहे!
त्याचा शब्द माझ्या कानीं पडत आहे;
तो म्हणतो, माझे भगिनी, माझे प्रिये, माझे
कपोते, माझे विमले:
मला दार उघड;
माझें डोकें दवानें थबथबलें आहे;
माझीं झुलपें रात्रीच्या दहिंवरबिंदूंनीं
भरून गेलीं आहेत.
३ मीं पेहराव उतरिला आहे, तो पुनः कसा लेऊं?
मीं पाय धुतले आहेत, ते पुनः कसे मळवूं?
४ माझ्या वल्लभानें झरोक्यांतून आपला हात
आंत घातला,
तेव्हां माझें हृदय त्याच्यासाठीं कळवळलें.
५ मी आपल्या वल्लभास दार उघडण्यासाठीं उठलें
तेव्हां अर्गळीच्या मुठीवरील गंधरस
माझ्या हातांस लागला,
माझ्या बोटांवरून त्याचा द्रव थिबकला.
६ मीं आपल्या वल्लभासाठीं दार उघडिलें,
आणि पाहतें तों तो निघून गेला होता.
तो बोलत होता तेव्हां माझा जीव
ठिकाणावर नव्हता;
मीं त्याचा शोध केला पण तो सांपडला नाहीं;
मीं त्याला हाका मारिल्या पण त्यानें उत्तर
दिलें नाहीं.
७ नगरांत फिरणारे जागल्ये मला भेटले;
त्यांनीं मला मार देऊन घायाळ केलें;
तटाच्या रखवालदारांनीं माझा शाल
हिसकावून घेतला.
८ यरुशलेमाच्या कन्यांनो, मी तुम्हांस शपथ घालून
विनंति करितें कीं
माझा वल्लभ तुम्हांस आढळला तर त्याला सांगा,
मला प्रेमज्वर लागला आहे.

९ स्त्रियांतल्या परम सुंदरी,
तुझ्या वल्लभांत इतरांहून अधिक तें काय आहे?
तूं आम्हांस शपथ घालितेस तर
तुझ्या वल्लभांत इतरांहून अधिक तें काय आहे?

१० माझा वल्लभ गोरापान व लालबुंद आहे;
तो लाखांत मोहरा आहे.
११ त्याचें शिर बावनकशी सोन्यासारखें आहे;
त्याचीं झुलपें कुरळ व डोमकावळ्यासारखीं काळीं
कुळकुळीत आहेत.
१२ त्याचे डोळे ओढ्यांच्या कांठांवरील
होल्यांसारखे आहेत;
ते दुधांत डुंबत असून नीट जडलेले आहेत.
१३ त्याचे गाल सुगंधोत्पादक वनस्पतीचे ताटवे आहेत;
त्याचे ओंठ कमलांप्रमाणें असून त्यांतून
गंधरस स्रवतो.
१४ त्याचे हात पुष्परागानें खचलेल्या
सुवर्ण नलिकाच होत;
त्याचें पोट नीलमणि जडलेल्या हस्तिदंतफलका-
सारखें आहे.
१५ त्याचे पाय सुवर्णाच्या कोंदणांत बसविलेल्या
संगमरवरी स्तंभांसारिखे आहेत;
त्याचा बांधा लबानोनासारखा आहे;
तो गंधसरूसारखा उमदा आहे;

१६ त्याची वाणी परम मधुर आहे;
तो सर्वस्वी मनोहर आहे.
यरुशलेमाच्या कन्यांनो,
माझा वल्लभ, माझा सखा, असा आहे !

६ १ स्त्रियांतल्या परम सुंदरी,
तुझा वल्लभ कोठें गेला ?
तुझा वल्लभ कोणीकडे निघून गेला तें सांग,
म्हणजे त्यास शोधावयाला आम्ही तुजबरोबर येऊं.

२ माझा वल्लभ आपल्या बागेंत, सुगंधी झाडांच्या ताटव्यांत गेला आहे;
तो उपवनांत कळप चारण्यास,
भुईकमळें वेचण्यास गेला आहे.
३ मी आपल्या वल्लभाची आहें,
व माझा वल्लभ माझा आहे;
तो आपला कळप भुईकमळांमध्यें चारितो.

४ माझ्या सखे, तूं तिरसाप्रमाणें सुंदर,
यरुशलेमाप्रमाणें सुरेख आहेस;
ध्वजा फडकाविणाऱ्या सेनेसारखी तूं हैराण करणारी आहेस.
५ तूं मजवरून आपले डोळे काढ;
त्यांनीं मला घाबरें केलें आहे;
तुझे केस गिलाद डोंगराच्या उतरणीवर बसलेल्या शेरडांच्या कळपासारखे दिसतात.
६ धुतलेल्या मेंढ्या जोडीजोडीनें येतात,
त्यांतल्या कोणाचीहि जोडी फुटत नसते,
त्यांच्या कळपासारखे तुझे दांत आहेत.
७ तुझ्या बुरख्यांतून तुझी कानशिलें
डाळिंबाच्या फाकेसमान दिसतात.
८ साठ राण्या, ऐंशी उपपत्नी,
आणि अगणित कुमारी आहेत;
९ पण माझी कपोती, माझी विमला अशी एकच;
ती आपल्या आईची एकुलती एक,
आपल्या जननीची लाडकी आहे;
तिला पाहून कन्यांनीं धन्य म्हटलें,
राण्यांनीं व उपपत्नींनीं तिची प्रशंसा केली.

१० ही प्रभातेसारखी आरक्त,
चंद्रासारखी सुंदर,
सूर्यासारखी निर्मळ,
ध्वजा फडकाविणाऱ्या सेनेप्रमाणें
भीति उत्पन्न करणारी अशी ही दर्शन देत आहे,
ती कोण ?
११ खोऱ्यांतील हिरवींगार झाडेंझुडपें पाहावीं,
द्राक्षलता फुटल्या आहेत कीं काय,
डाळिंबीला फुलें आलीं आहेत कीं काय,
तें पाहावें म्हणून मी अक्रोडाच्या बागेंत गेलें होतें.
१२ माझ्या राजवंशी लोकांच्या रथांत
माझ्या मनानें मला उचलून बसविलें,
याचें मला भानच राहिलें नाहीं.

१३ मागें फीर, मागें फीर, अगे शुलेमकरिणी;
मागें फीर, मागें फीर, म्हणजे आम्ही तुला डोळे भरून पाहूं.

शुलेमकरिणीचें तुम्ही काय पाहूं इच्छितां ?
महनाइम येथील नृत्यासारखें नृत्य काय ?

७ १ हे राजकन्ये, तुझे पादत्राणयुक्त पाय किती सुंदर आहेत !
कुशल कारागिराच्या हातच्या रत्नहारांसारख्या
तुझ्या जांघा गोल आहेत.
२ तुझी नाभि वाटोळा गरगरीत पेलाच आहे;
त्यांत मिश्रित द्राक्षारसाची वाण नाहीं,
तुझें उदर सभोवतीं भुईकमळें लाविलेल्या गव्हाच्या राशीसारखें आहे.
३ तुझें कुचद्वय हरिणीच्या जुळ्या
पाडसांसारखें आहे.

४ तुझा कंठ हस्तदंती मनोऱ्यासारखा आहे;
तुझे नेत्र बाथ-रब्बीमच्या वेशीजवळील हेशबोनच्या
कुंडांसारखे आहेत;
तुझें नाक दिमिष्कासमोरील लबानोनाच्या बुरजा-
सारखें आहे.
५ तुझा शिरोभाग कर्मेलासारखा आहे;
तुझ्या डोक्याचे केस जांभळ्या वस्त्रासारखे आहेत;
तुझ्या केशपाशांत राजा बद्ध आहे.

६ हे प्रिये, मनोरम विषयांमध्यें तूं किती सुंदर,
किती चित्ताकर्षक आहेस !
७ तुझा हा बांधा तालवृक्षासारखा आहे;
तुझे कुच द्राक्षांच्या घोसांसारखे आहेत.
८ मीं म्हटलें, मी तालवृक्षावर चढून
त्याच्या शाखा धरीन;
तेव्हां तुझे कुच मला द्राक्षांच्या
घोसांसमान व्हावे,
आणि तुझ्या नासिकेचा श्वास सफरचंदाच्या
सुवाससमान व्हावा;
९ तुझें मुख उत्तम द्राक्षारसासमान व्हावें;
तो माझ्या प्रियेप्रीत्यर्थ घशांत नीट उतरतो;
निद्रिस्तांच्याहि तोंडांतून तो खालीं सहज जातो.

१० मी आपल्या वल्लभाची आहें;
त्याचें मन मजवर बसलें आहे.
११ माझ्या वल्लभा, ऊठ, आपण गांवढ्यांत जाऊं;
खेड्यांत रात्र घालवूं.
१२ आपण प्रातःकाळीं उठून द्राक्षीच्या मळ्यांत जाऊं;
तेथें द्राक्षी फुटून तिच्या कळ्या उमलल्या आहेत
कीं काय,
डाळिंबीला फुलें आलीं आहेत कीं काय तें पाहूं;
तेथें मी आपलें प्रेम तुला अर्पीन.
१३ पुत्रदात्रीचा सुगंध सुटला आहे;
आमच्या दारांवर नाना प्रकारचीं, नव्याजुन्या
बारांचीं उत्तम फळें आहेत;
हे माझ्या वल्लभा, तीं मीं तुजसाठीं जतन करून
ठेविलीं आहेत.

८

१ तूं माझ्या बंधूसारखा,
माझ्या मातेचें स्तनपान केलेल्यासारखा
असतास तर किती बरें होतें !
तूं मला बाहेर रस्त्यांत कोठें भेटल्यास मीं तुझें
चुंबन घेतलें असतें,
माझी कोणी अप्रतिष्ठा केली नसती.
२ मी तुला आपल्या मातृगृहीं घेऊन गेलें असतें,
तूं मला शिकविलें असतें,
मसाला घातलेला द्राक्षारस, माझ्या डाळिंबाचा रस
मीं तुला प्यावयास दिला असता.
३ त्याचा डावा हात माझ्या डोक्याखालीं असो;
त्याचा उजवा हात मला आलिंगो.
४ यरुशलेमाच्या कन्यांनो,
तुम्हांस शपथ घालून सांगतें;
माझ्या प्रेमानंदाला व्यत्यय आणूं नका,
विघ्न आणूं नका.
तो राहील तितका वेळ राहूं द्या.

५ आपल्या वल्लभावर ओठंगून
रानांतून येत आहे ही कोण ?
सफरचंदाच्या झाडाखालीं मीं तुझें प्रेम जागृत केलें;
तेथें तुझी माता तुला प्रसवली;
तुझ्या जननीला तेथें प्रसववेदना झाल्या.
६ आपल्या हृदयाशीं मला मुद्रेप्रमाणें ठेव,
मुद्रेप्रमाणें मला आपल्या बाहूवर ठेव;
कारण प्रेम मृत्यूसारखें प्रबळ आहे;
प्रेमसंशय अधोलोकासारखा निष्ठुर आहे;
त्याची ज्वाला अग्निज्वालेसारखी,
किंबहुना परमेशानें प्रदीप्त केलेला तो अग्नि आहे.
७ असलें प्रेम महाजलांच्यानेंहि विझवणार नाहीं;
महापुरांलाहि तें बुडवून टाकितां येणार नाहीं;
मनुष्यानें प्रेमासाठीं आपल्या घरची
सगळी संपत्ति दिली

तरी ती त्यापुढें तुच्छ होय.

८ आमची एक धाकटी बहीण आहे,
तिला अजून ऊर फुटले नाहींत;
आमच्या ह्या बहिणीस मागणी येईल त्या दिवशीं
आम्हीं तिचें काय करावें ?
९ ती तटासारखी असली तर
तिजवर आम्ही रुप्याचा मनोरा बांधूं;
ती वेशीसारखी असली तर
गंधसरूच्या फळ्यांनीं तिची बंदिस्ती करूं.

१० मी तटासारखी होतें, माझे कुच बुरुजांसारखे होते,
म्हणून मी आपल्या वल्लभाच्या दृष्टीनें
कृपाप्रसादास पात्र झालें.
११ बाल-हामोन येथें शलमोनाचा एक द्राक्षीचा
मळा होता;
त्यानें तो बागवानांस लावून दिला होता;
त्यांतील फळांबद्दल प्रत्येकानें हजारहजार रुपये
द्यावे असें होतें.
१२ माझाहि एक द्राक्षीचा मळा आहे; त्यावर माझी
मालकी आहे;
हे शलमोना, त्याबद्दलचे हजार रुपये तुझे
आणि दोनशें रुपये फळांची राखण करणाऱ्यांचे.

१३ अगे बागांत राहणारे,
तुझ्या सख्या तुझे शब्द ऐकण्यास
आतुर झाल्या आहेत;
मलाहि ते ऐकीव.

१४ माझ्या वल्लभा, त्वरा कर,
सुगंधी वनस्पतींच्या डोंगरांवर
हरिणासारखा, मृगीच्या पाडसासारखा तूं हो.

---

# यशया



**१** १ यहूदाचे राजे उज्जीया, योथाम, आहाज व
हिज्कीया यांच्या काळीं यहूदा व यरुशलेम
यांविषयीं आमोजाचा पुत्र यशया याला झालेला
दृष्टांत.
२ हे आकाशा, ऐक; अगे पृथ्वी, कान दे, कारण
परमेश्वर बोलत आहे; मीं मुलांचें पालनपोषण केलें,
त्यांस लहानाचें मोठें केलें तरी तीं माझ्याशीं फितूर
झालीं. ३ बैल आपल्या धन्याला ओळखितो, गाढव
आपल्या मालकाचा कोठिंबा ओळखितो; पण इस्राएल
ओळखीत नाहीं, माझे लोक विचार करीत नाहीत.
४ किती हें पापिष्ट राष्ट्र ! दुष्कर्मानें भारावलेले लोक, दुर्ज-
नांची संतति ! हीं आचारभ्रष्ट मुलें ! यांनीं परमेश्वराला
सोडिलें आहे, इस्राएलाच्या पवित्र प्रभूस तुच्छ मानिलें
आहे; तीं वियुक्त होऊन मागें फिरलीं आहेत. ५ तुम्ही
अधिकाधिक फितून मार कां खात राहतां ? हरएक
मस्तक व्यथित झालें आहे, हरएक हृदय म्लान झालें
आहे. ६ पायाच्या तळव्यापासून मस्तकापर्यंत कांहींच
धड नाहीं; जखमा, चेंचरलेले व पुवळलेले घाय आहेत;
ते कोणी पिळून काढीत नाहीं, त्यांवर कोणी पट्टी बांधीत
नाहीं, कोणी तेलानें नरम करीत नाहीं. ७ तुमचा देश
ओसाड आहे; तुमचीं नगरें अग्नीनें जळलीं आहेत;
तुमचीं शेतें परके लोक तुम्हांदेखत खाऊन टाकीत
आहेत; परक्यांनीं उद्‍ध्वस्त केल्याप्रमाणें तीं ओसाड
झालीं आहेत. ८ सीयोनाची कन्या द्राक्षीच्या मळ्यांतल्या

खोपीसारखी, कांकड्यांच्या बागेंतल्या माचाळासारखी, वेढा
पडलेल्या नगरासारखी राहिली आहे. ९ सेनाधीश परमेश्व-
रानें आम्हांसाठीं यत्किंचित् शेष राखून ठेविलें नसतें तर
आम्ही सदोमासारखे झालों असतों, गमोऱ्याप्रमाणें
बनलों असतों.

१० सदोमाच्या अधिपतींनो, परमेश्वराचें वचन ऐका;
गमोऱ्याच्या लोकांनो, आमच्या देवाच्या धर्मशास्त्राकडे
कान द्या. ११ परमेश्वर म्हणतो, तुमचे बहुत यज्ञबलि
माझ्या काय कामाचे? मेंढरांचे होम, पुष्ट वासरांची
वपा यांनीं माझी अति तृप्ति झाली आहे; बैल,
कोकरें व बोकड यांच्या रक्तानें मला संतोष होत नाहीं.
१२ तुम्ही माझें दर्शन घेण्यास येतांना माझीं अंगणें
तुडवितां, हें तुम्हांस सांगितलें कोणीं? १३ निरर्थक
अर्पणें आणखी आणूं नका; धुपाचा मला वीट आहे;
चंद्रदर्शन, शब्बाथ व मेळे भरविणें मला खपत नाहीं;
सणाचा मेळा हाहि अधर्मच होय. १४ माझा जीव
तुमचीं चंद्रदर्शनें व सण यांचा द्वेष करितो; त्यांचा
मला भार झाला आहे; तो सोसून मी थकलों आहें.
१५ तुम्ही हात पसरतां तेव्हां मी तुमच्यापुढें
डोळे झाकितों; तुम्हीं कितीहि विनवण्या केल्या तरी
मी ऐकत नाहीं; तुमचे हात रक्तानें भरले आहेत.
१६ आपणांस धुवा, स्वच्छ करा; माझ्या डोळ्यांपुढून
आपल्या कर्मांचें दुष्टपण दूर करा; दुष्टपणा करण्याचें
सोडून द्या; १७ चांगलें करण्यास शिका, नीतीच्या मार्गे
लागा; जुलम्याला ताळ्यावर आणा;[1] अनाथाचा न्याय
करा; विधवेचा कैवार घ्या.

१८ परमेश्वर म्हणतो, चला, या, आपण बुद्धिवाद
करूं; तुमचीं पातकें लाखेसारखीं लाल असलीं तरी तीं
बर्फासारखीं पांढरीं होतील; तीं किरमिजासारखीं तांबडीं
असलीं तरी लोकरीसारखीं निघतील. १९ तुम्ही
माझें ऐकावयाला मान्य व्हाल तर भूमीचें उत्तम फळ
खाल; २० तुम्ही अमान्य होऊन बंड कराल तर
तरवार तुम्हांला खाऊन टाकील; कारण परमेश्वराच्या
तोंडचें हें वचन आहे.

२१ साध्वी नगरी कशी असाध्वी झाली आहे? ती
न्यायपूर्ण होती, तींत धर्म वसत असे, आतां तींत
घातकी राहतात. २२ तुझें रुपें कीट झालें आहे; तुझ्या
द्राक्षारसांत पाणी मिसळलें आहे. २३ तुझे सरदार
बंडखोर व चोरांचे साथीदार झाले आहेत; त्यांतील
प्रत्येकाला लाचांची आवड आहे, प्रत्येक जण नजराण्यां-
मागें लागणारा आहे; ते अनाथाचा न्याय करीत
नाहींत, विधवेची दाद घेत नाहींत.

२४ याकरितां प्रभु, सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा
समर्थ देव म्हणतो, माझ्या शत्रूंचा समाचार घेऊन मी
स्वस्थता पावेन, माझ्या वैऱ्यांचा सूड घेईन; २५ मी
आपला हात तुला लावून क्षार घातल्यासारखा तुझें
कीट गाळून नाहींसें करीन, तुझ्यांतील सर्व शिसे
काढून टाकीन; २६ आणि मी पूर्वीप्रमाणें तुला
न्यायाधीश व आरंभींच्याप्रमाणें तुला पुनः मंत्री
देईन; आणि मग तुला धर्मपुरी, सती नगरी म्हणतील.
२७ सीयोनाचा न्यायेंकरून उद्धार होईल व त्यांतील
पापनिवृत्त जन नीतीनें उद्धरले जातील. २८ बंडखोर व
पापी यांचा बरोबरच विध्वंस होईल; परमेश्वराला सोड-
णारे नष्ट होतील. २९ तुमच्या आवडीचीं जीं एलाचीं
झाडें त्यांविषयीं ते लज्जित होतील, आणि ज्या बागांवर
तुमचें मन बसलें होतें त्यांसंबंधानें तुमच्या तोंडाला
काळिमा लागेल; ३० कारण तुम्ही पाला सुकून गेलेल्या
एलाच्या झाडासारखे, पाणी नसलेल्या बागेसारखे
व्हाल. ३१ बलाढ्य मनुष्य पिंजलेल्या तागासारखा
होईल, आणि त्याच्या हातचें काम ठिणगी होईल; तीं
दोन्ही बरोबरच जळतील, तीं कोणी विझविणार नाहीं.

२ १ आमोजाचा पुत्र यशया याला यहूदा व
यरुशलेम यांविषयीं प्राप्त झालेलें दृष्टांतवचन:
२ शेवटल्या दिवसांत असें होईल कीं
परमेश्वराच्या मंदिराचा डोंगर पर्वताच्या माथ्यावर
स्थापण्यांत येईल, आणि सर्व डोंगरांहून तो उंच होईल;
त्याकडे सर्व राष्ट्रांतील लोक लोटतील. ३ देशोदेशां-
तील लोकांच्या झुंडी जातील व म्हणतील, चला,

१ **अथवा**: पीडितास मुक्त करा;

आपण परमेश्वराच्या पर्वतावर याकोबाच्या देवाच्या
मंदिराकडे चढून जाऊं; तो आम्हांस आपले मार्ग
शिकवो, म्हणजे आम्ही त्याच्या पथांनीं चालूं; कारण
सीयोनांतून धर्मशास्त्र व यरुशलेमांतून परमेश्वराचें वचन
निघेल. ४ तो राष्ट्रांचा न्यायनिवाडा करील,
देशोदेशींच्या बहुल लोकांचा इनसाफ करील; तेव्हां
ते आपल्या तरवारी मोडून त्यांचे फाळ करितील,
आपल्या भाल्यांच्या कोयत्या करितील; यापुढें एक राष्ट्र
दुसऱ्या राष्ट्रावर तरवार उचलणार नाहीं; ते इतःपर
युद्धकला शिकणार नाहींत.

५ याकोबाच्या घराण्या, चल, ये, आपण परमे-
श्वराच्या प्रकाशांत चालूं. ६ तुझे लोक, म्हणजे
याकोबाचें घराणें, याचा तूं त्याग केला आहे; कारण ते
पूर्वेकडील रितीभातींत मग्न झाले आहेत, पलिष्ट्यां-
सारखे मांत्रिक बनले आहेत आणि परदेशीयांच्या
हातांत हात घालीत आहेत. ७ त्यांचा देश सोन्या-
रुप्यानें भरला आहे; त्यांच्या निधीला अंत नाहीं.
त्यांचा देश घोड्यांनीं भरून गेला आहे, त्यांच्या रथांला
अंत नाहीं. ८ त्यांचा देश मूर्तींनीं भरून गेला आहे; ते
आपल्या हातांनीं घडलेल्या, बोटांनीं केलेल्या वस्तूंची
पूजा करितात. ९ हलका मनुष्य लवला आहे, थोर
मनुष्य नीचावस्था पावला आहे; त्यांची तूं क्षमा
करूंच नको. १० परमेश्वराच्या भयप्रद दृष्टीपुढून,
त्याच्या ऐश्वर्याच्या प्रतापापुढून खडकांत दडून जा;
आपणाला धुळींत पुरून घे. ११ त्या दिवशीं लोकांची
उन्मत्त दृष्टि नीच होईल, माणसांचा गर्व उतरेल, व
परमेश्वरच कायतो उच्च स्थानीं विराजेल.

१२ सर्व जें कांहीं गर्विष्ठ, उन्मत्त व चढेल आहे त्या-
साठीं सेनाधीश परमेश्वरानें दिवस नेमिला आहे; त्या
दिवशीं तें नीच होईल. १३ लबानोनाचे मोठे व उंच
गेलेले सर्व गंधसरू, बाशानांतील सर्व अल्लोनाचीं झाडें;
१४ सर्व उंच पर्वत, सर्व मोठे डोंगर; १५ सर्व उंच
बुरुज, सर्व मजबूत तट; १६ तार्शीशाचीं सर्व गलबतें
व सर्व मनोहर मनोरे यांसाठीं दिवस नेमिला आहे.
१७ त्या दिवशीं लोकांचा उन्मत्तपणा भंग पावेल,
मनुष्यांचा गर्व उतरेल; आणि परमेश्वरच कायतो उच्च-
स्थानीं विराजेल. १८ मूर्ति तर अगदीं नाहींतशा
होतील. १९ परमेश्वर पृथ्वीस भयकंपित करण्यास
उठेल तेव्हां त्याच्या भयप्रद दृष्टीपुढून व त्याच्या
ऐश्वर्याच्या प्रतापापुढून लोक खडकांच्या गुहांत व
भूमीच्या विवरांत शिरतील. २० मनुष्यांनीं पुजण्यासाठीं
केलेल्या सोन्यारुप्याच्या मूर्ति त्या दिवशीं लोक
चिचुंद्र्या व वडवागळें यांपुढें टाकून देतील.
२१ परमेश्वर पृथ्वीस भयकंपित करण्यास उठेल तेव्हां
त्याच्या भयप्रद दृष्टीपुढून व त्याच्या ऐश्वर्याच्या प्रतापा-
पुढून ते खडकांच्या गुहांत व दगडाच्या कपारींत
शिरतील. २२ मनुष्याचें नांवच घेऊं नका; त्याचा
श्वास त्याच्या नाकपुड्यांत आहे; त्याला काय जमेस
धरावयाचें आहे?

३ १ पाहा, प्रभु, सेनाधीश परमेश्वर, यरुशलेम व
यहूदा यांचा आधार व टेका काढून घेतो, म्हणजे
भाकरीचा सर्व आधार व पाण्याचा सर्व आधार
काढून घेतो; २ वीर व योद्धा, न्यायाधीश व संदेष्टा,
दैवज्ञ व वडील, ३ पन्नासांचा नायक, प्रतिष्ठित पुरुष,
मंत्री, शिल्पप्रवीण व मंत्रनिपुण यांस काढून घेतो. ४ मी
मुलांस त्यांचे अधिपति करीन; त्यांजवर पोरकटपणाचा
अमल चालेल. ५ हा त्याला व तो ह्याला, असे लोक
एकमेकांस पीडितील; मुलगा वडिलांशीं व हलका
प्रतिष्ठिताशीं दांडगाईनें वर्तेल. ६ कोणी आपल्या
वडिलाच्या घरांत भावाचा हात धरून म्हणेल, तुला
वस्त्रप्रावरण आहे तर तूं आमचा अधिकारी हो, ही
मोडतोड आपल्या हातीं घे; ७ त्या दिवशीं तो ओरडून
म्हणेल, मी दुरुस्ती करणारा होणार नाहीं, माझ्या घरीं
अन्नवस्त्र नाहीं, मला लोकांचा नायक करूं नका.
८ यरुशलेम कोसळलें आहे, यहूदा पतन पावला
आहे; कारण त्यांची जिव्हा व त्यांचीं कृत्यें परमेश्वरा-
विरुद्ध असून ते त्याच्या तेजोमय नेत्रांला तुच्छ लेखि-
तात. ९ त्यांची मुद्रा त्यांच्याविरुद्ध साक्ष देते; ते सदोमा-
प्रमाणें आपलें पाप जाहीर करितात, लपवीत नाहींत;
त्यांच्या जीविताला धिक्कार असो; ते स्वतांचें वाईट

करून घेतात. १० धार्मिकांविषयीं म्हणा कीं त्यांचें कल्याण होणार; कारण ते आपल्या कृत्यांचें फळ उपभोगणार. ११ दुष्ट हायहाय करणार; त्याचें वाईट होणार; कारण त्यानें आपल्या हातांनीं जें केलें त्याचें फळ त्याला मिळेल. १२ माझ्या लोकांविषयीं म्हणाल तर पोरें त्यांस पीडितात; स्त्रिया त्यांजवर अधिकार चालवितात. हे माझ्या प्रजे, तुझे नेते तुला बहकवितात; त्यांनीं तुझ्या जाण्याच्या वाटा बुजवून टाकिल्या आहेत.

१३ परमेश्वर वाद चालविण्यास उभा आहे; राष्ट्रांचा न्याय करण्यास उभा आहे. १४ परमेश्वर आपल्या लोकांचे वडील व सरदार यांचा निवाडा करील; तुम्हींच द्राक्षीचा मळा खाऊन टाकिला आहे; दीनांची लूट तुमच्या घरांत आहे. १५ तुम्ही माझ्या लोकांस चिरडितां, दीनांचें तोंड ठेचितां, हें काय, असें प्रभु सेनाधीश परमेश्वर याचें म्हणणें आहे.

१६ परमेश्वर असेंहि म्हणतो, सीयोनाच्या कन्या गर्विष्ठ आहेत, त्या मान ताठ करून व डोळे मारीत चालतात, आपल्या पायांतील नूपुरांचा छमछम आवाज करीत ठुमकत चालतात; १७ म्हणून प्रभु सीयोनाच्या कन्यांच्या माथ्यांला खवडे उठवील व परमेश्वर त्यांचीं गुह्यांगें उघडीं करील. १८ तो त्या दिवशीं पैंजण, बिंद्या व चंद्रकोरी, १९ बाळ्या, तोडे, जाळ्या, २० शिरोभूषणें, सांखळ्या, कमरपट्टे, अत्तरदाण्या व ताईत, २१ अंगठ्या व नथा, २२ भपक्याचा पोशाक, कुडत्यां, शाला, बटवे, २३ आरसे, मलमलीचीं वस्त्रें, दुपट्टे व ओढण्या यांची शोभा नाहींशी करील; २४ आणि मधुर सुवासाच्या जागीं कुजल्याची घाण, कमरपट्ट्याच्या जागीं दोरी, वेणीफणी केलेल्या केसांच्या जागीं टक्कल, झग्याच्या जागीं गोणताटाचें वेष्टण व सौंदर्याच्या जागीं डाग असें होईल. २५ तुझे पुरुष तरवारीनें पडतील, तुझे वीर लढाईंत पडतील. २६ तेव्हां तिच्या वेशी आक्रंद करितील, शोकाकुल होतील व ती एकटी होऊन भुईवर बसेल. १ त्या समयीं सात स्त्रिया

४ एका पुरुषाला धरून म्हणतील, आम्ही स्वतःचें अन्न खाऊं व स्वतःचें वस्त्र लेऊं; तुझें नांव मात्र आम्हांला लावूं दे; आमची अपकीर्ति दूर कर.

२ त्या समयीं परमेश्वराचा अंकुर शोभिवंत व तेजस्वी होईल; भूमीचें उत्पन्न इस्राएलाच्या बचावलेल्यांस वैभव व शोभा देणारें होईल. ३ मग असें होईल कीं सीयोनांत उरलेल्या, यरुशलेमांत शेष राहिलेल्या ज्या प्रत्येकाचें नांव यरुशलेमांतील जीवन पावणाऱ्यांच्या यादींत लिहिलें आहे त्या प्रत्येकास पवित्र म्हणतील. ४ प्रभु न्याय करणाऱ्या व दहन करणाऱ्या आत्म्याच्या द्वारें सीयोनाच्या कन्यांचा मळ काढून टाकील आणि यरुशलेमांतून तिचा रक्तदोष काढून टाकील, तेव्हां असें घडेल; ५ आणि परमेश्वर सीयोन डोंगराच्या प्रत्येक स्थानावर व त्याच्या सणांमेळ्यांवर दिवसास धूममय मेघ व रात्रीस प्रज्वलित अग्नीचा प्रकाश निर्माण करील; कारण त्याच्या सर्व वैभवावर छत्र होईल; ६ आणि दिवसास ऊन लागूं नये, सावली व्हावी; आणि वादळ व पाऊस यांपासून रक्षण होण्यासाठीं निवारा व आश्रय असावा म्हणून मंडप घालण्यांत येईल.

१ मी आपल्या वल्लभाप्रीत्यर्थ गाणें गाईन,
५ आपल्या प्रियतमाचें त्याच्या द्राक्षीच्या मळ्याविषयींचें गीत गाईन. माझ्या वल्लभाचा द्राक्षमळा डोंगराच्या एका अतिशयित सुपीक शृंगावर होता; २ तो त्यानें खणून त्यांतील गोटे काढून टाकिले व तेथें उत्तम प्रतीच्या द्राक्षीच्या वेलाची लागवड केली, आणि त्यांत एक बुरूज बांधिला व द्राक्षकुंड खोदिलें; मग त्यापासून द्राक्षें पैदा होतील म्हणून वाट पाहिली, तों त्यानें रानद्राक्षें दिलीं. ३ तर आतां यरुशलेमकरांनो व यहूदांतील लोकांनो, माझा व माझ्या द्राक्षीच्या मळ्याचा न्याय करा बरें. ४ माझ्या द्राक्षीच्या मळ्यांत मीं केलें नाहीं असें अधिक काय करावयाचें राहिलें ? तो द्राक्षें देईल म्हणून मी वाट पाहत असतां त्यानें रानद्राक्षें कां दिलीं ? ५ आतां मी

१ **मुळांत** : उजाड

आपल्या द्राक्षीच्या मळ्याचें काय करणार तें तुम्हांस सांगतों : मी त्याचें कुंपण काढून टाकीन म्हणजे तो खाऊन टाकितील; त्याचें आवार मोडीन म्हणजे तो तुडविला जाईल. ६ मी तो उद्‌ध्वस्त करीन; त्याला कोणी खणी करणार नाहीं व कुदळणार नाहीं; त्यांत कांटेसराटे उगवतील; त्यावर पाऊस पाडूं नका अशी आज्ञा मी मेघांस करीन. ७ कारण सेनाधीश परमेश्वराचा द्राक्षमळा म्हणजे इस्राएलांचें घराणें; त्यांतील त्याची आवडीची लागवड म्हणजे यहूदाचे लोक; त्यानें न्याय्यत्वाची अपेक्षा केली तों अपहार; धार्मिकतेची अपेक्षा केली तों आक्रोश आढळून आला.

८ जे घराशीं घर व शेताशीं शेत जोडून घेतात, जागा मुळींच उरूं देत नाहींत त्यांस धिक्कार असो; तुमचीच कायती देशांत वस्ती आहे असें झालें आहे. ९ सेनाधीश परमेश्वरानें माझ्या कानांत सांगितलें; बहुत मोठीं व सुंदर घरें खरोखर ओसाड व लोकरहित होतील. १० दहा बिघे द्राक्षमळा दहा शेर रस देईल; एक मण बीं एक पायली धान्य देईल.

११ जे पहाटेस उठून मद्याच्या पाठीस लागतात, जे अपरात्रपर्यंत द्राक्षारस पिऊन धुंद होतात त्यांस धिक्कार असो. १२ वीणा, सारंगी, डफ, बासरी व द्राक्षारस हींच त्यांची मेजवानी; पण ते परमेश्वराच्या कृतीकडे लक्ष देत नाहींत, ते त्याच्या हातचें कार्य पाहत नाहींत.

१३ यास्तव माझे लोक अज्ञानामुळें बंदिवासांत गेले आहेत; त्यांतले प्रतिष्ठित उपाशीं मरत आहेत, आणि लोकसमुदाय तृषाक्रांत झाला आहे. १४ ह्यामुळें अधोलोकानें आपली क्षुधा वाढविली आहे, आपलें तोंड अमर्याद पसरिलें आहे; त्यांत त्यांचें वैभव, त्यांचे जमाव, त्यांचा थाटमाट, तेथले मौज मारणारे हीं पडतील. १५ हलके लोक दबले आहेत, बडे लोक नीचावस्था पावले आहेत, गर्विष्ठांची मान खालीं झाली आहे; १६ सेनाधीश परमेश्वर तर न्यायानें उन्नत असा प्रकट होईल; पवित्र देव धार्मिकतेनें पवित्र असा प्रगट होईल. १७ येथें कोकरें आपलें कुरण समजून चरतील, धष्टपुष्टांच्या ओसाड झालेल्या जागा परके खाऊन टाकितील.

१८ जे दुष्टतेच्या दोऱ्यांनीं दुष्कर्माला, जसें काय गाडीच्या दोरानें पापिष्ठपणाला ओढून आणितात, त्यांस धिक्कार असो; १९ ते म्हणतात, त्यानें त्वरा करावी, आपलें कार्य शीघ्र करावें म्हणजे आम्हांस तें पाहावयास सांपडेल; इस्राएलाच्या पवित्र प्रभूचा संकल्प लवकर पूर्ण होवो, म्हणजे आम्हांला त्याचा अनुभव घडेल.

२० जे वाईटाला बरें व बऱ्याला वाईट म्हणतात, जे प्रकाशाला अंधकार व अंधकाराला प्रकाश समजतात, गोडाला कडू व कडूला गोड मानितात त्यांस धिक्कार असो.

२१ जे आपल्या दृष्टीनें ज्ञानी व आपल्या मतें समंजस त्यांस धिक्कार असो.

२२ ज्यांचें शौर्य द्राक्षारस पिण्यांत आणि ज्यांची बहादुरी मद्य मिसळण्यांत; २३ जे लांच घेऊन दुष्कर्म करणाऱ्यास निर्दोषी ठरवितात व धार्मिकाच्या निर्दोषीपणाची हानि करितात, त्यांस धिक्कार असो.

२४ यास्तव अग्नीची ज्वाळा धसकट खाऊन टाकिते, व वाळलेल्या गवताचें अग्नींत भस्म होऊन जातें तसें त्यांचें मूळ कुजलेल्या पदार्थासारखें होईल; त्यांचा फुलवरा धुळीसारखा उडून जाईल; कारण त्यांनीं सेनाधीश परमेश्वराचें धर्मशास्त्र तुच्छ लेखिलें आहे, इस्राएलाच्या पवित्र प्रभूचें वचन अव्हेरिलें आहे.

२५ यासाठीं परमेश्वराचा क्रोध त्याच्या लोकांवर पेटला आहे; त्यानें आपला हात त्यांजवर उगारून त्यांस मारिलें आहे; डोंगर थरारले; त्यांचीं प्रेतें रस्त्यांतल्या घाणीसारखीं आहेत. इतकें झालें तरी त्याचा क्रोध शमला नाहीं, त्याचा हात अजून उगारलेला आहे.

२६ तो दूरच्या राष्ट्रांसाठीं निशाण उभारितो व शीळ घालून दिगंतापासून त्यांस बोलावितो; पाहा, ते त्वरा करून धावत येत आहेत. २७ त्यांतील कोणी थकलेला, कोणी ठोकर खाल्लेला नाहीं; कोणी डुकली किंवा झोप घेणारा नाहीं, कोणाचा कमरबंद सैल झालेला नाहीं, कोणाच्या वाहणांचे बंद तुटलेले नाहींत; २८ त्यांचे बाण तीक्ष्ण आहेत, त्यांचीं धनुष्यें सज्ज केलीं आहेत; त्यांच्या घोड्यांचे खूर गार-

सारखे, त्यांचीं चाकें वावटळीसारखीं आहेत; २९ ते सिंहासारखी गर्जना करीत आहेत; ते तरुण सिंहांप्रमाणें गुरगुरत आहेत व गुरगुरून शिकार पकडीत आहेत; ते ती घेऊन जात आहेत, कोणी सोडवीत नाहींत. ३० त्या दिवशीं समुद्रगर्जनेप्रमाणें ते त्यांजवर गर्जना करितील; भूमीकडे पाहावें तों अंधकार व संकट; तेथील अभ्रांमुळें प्रकाश जाऊन काळोख होईल.

६ १ उज्जीया राजा मरण पावला त्या वर्षी प्रभूस उच्चस्थळीं असलेल्या उच्च सिंहासनावर बसलेलें मीं पाहिलें; त्याच्या झग्याच्या सोग्यांनीं मंदिर व्यापून गेलें होतें. २ त्याच्या भोवतालीं सराफीम उभे होते; त्या प्रत्येकाला सहासहा पंख होते; दोहोंनीं तो आपलें तोंड झाकी, दोहोंनीं आपले पाय झाकी व दोहोंनीं उडे. ३ ते आळीपाळीनें उच्चस्वरानें म्हणत, पवित्र! पवित्र! पवित्र! सेनाधीश परमेश्वर! अखिल पृथ्वीची[1] समृद्धि त्याचें वैभव होय. ४ घोषणा करणाऱ्यांच्या ह्या वाणीनें उंबरठे हालले व मंदिर धुरानें भरलें. ५ तेव्हां मी म्हणालों, हायहाय! माझें आतां वाईट झालें, कां तर मी अशुद्ध ओठांचा मनुष्य आहें आणि मी अशुद्ध ओठांच्या लोकांत राहतों; आणि सेनाधीश परमेश्वर, राजाधिराज ह्यास मीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलें.

६ मग एक साराफदूत वेदीवरील इंगळ चिमट्यानें हातीं घेऊन मजकडे उडत आला; ७ तो माझ्या ओठांस लावून त्यानें म्हटलें, पाहा, याचा स्पर्श तुझ्या ओठांस झाला म्हणून तुझा दोष दूर झाला आहे, तुझ्या पापाचें प्रायश्चित्त झालें आहे. ८ तेव्हां मीं प्रभूची वाणी ऐकली ती अशी, मी कोणाला पाठवूं? आमच्यासाठीं कोण जाईल? तेव्हां मी म्हणालों, हा मी आहें, मला पाठीव. ९ तो म्हणाला, जा, या लोकांस सांग कीं ऐकत राहा पण समजूं नका, पाहत राहा पण जाणूं नका. १० ह्या लोकांनीं डोळ्यांनीं पाहून, कानांनीं ऐकून व मनानें समजून, मजकडे वळून सुधारूं नये म्हणून त्यांचें हृदय जड कर, त्यांचे कान बधिर कर व त्यांचे डोळे चिपडे कर. ११ मी म्हणालों, हे प्रभु, असें कोठवर? तो म्हणाला, नगरें वस्तीहीन होतील, घरें मनुष्यविरहित होतील, जमीन ओसाड व वैराण होईल, १२ परमेश्वर लोकांस दूर घालवून देईल व देशांत ओसाड स्थळें बहुत होतील तोंवर. १३ त्यांत लोकांचा दहावा हिस्सा राहिला तर त्याचाहि नाश व्हावयाचा; तरी एला व अल्लोन हीं झाडें तोडिल्यावर ज्याप्रमाणें त्यांचा बुडखा राहतो त्याप्रमाणें त्यांचा बुडखा पवित्र बीज असा राहील.[1]

७ १ यहूदाचा राजा आहाज बिन योथाम बिन उज्जीया याच्या काळीं असें झालें कीं अरामाचा राजा रसीन व इस्राएलाचा राजा पेकह बिन रमाल्या हे यरुशलेमावरोबर लढण्यास चढाई करून गेले, परंतु त्यांची त्यावर कांहीं सरशी झाली नाहीं. २ अरामाची एफ्राइमाशीं जूट झाली आहे असें दाविदाच्या घराण्याला कळविण्यांत आलें. तेव्हां रानांतील वृक्ष वाऱ्यानें कांपतात तसें त्याचें मन व त्याच्या लोकांचीं मनें कंपित झालीं.

३ तेव्हां परमेश्वर यशयास म्हणाला, तूं आपला पुत्र शआर-याशूब (अवशेष परत येईल) यास बरोबर घेऊन वरच्या तळ्याचा नळ जेथें संपतो तेथें परटाच्या शेताच्या वाटेवर आहाजास भेटावयाला जा; ४ आणि त्याला सांग कीं, सावध हो व शांत राहा; भिऊं नको; ह्या दोन कोलितांच्या उरलेल्या धुमसणाऱ्या शेपटांमुळें म्हणजे क्रोधसंतप्त झालेले अरामी रसीन व रमाल्याचा पुत्र यांच्यामुळें तुझें मन खचूं देऊं नको. ५ अराम, एफ्राईम व रमाल्याचा पुत्र यांनीं तुजविरुद्ध दुष्ट संकल्प केला आहे कीं ६ आपण यहूदावर चालून जाऊन त्यास धाक घालूं, तटबंदी फोडून तो घेऊं आणि ताबेलाच्या पुत्राची त्यामध्यें राजा म्हणून स्थापना करूं. ७ प्रभु

[1] अथवा: पृथ्वी त्याच्या तेजानें भरली आहे.

[1] अथवा: तरी पण त्यांतला दहावा हिस्सा राहील, आणि तो परत येईल; तो भस्म होईल तथापि एला व अल्लोन ह्या वृक्षांचीं पानें गळाल्यावर त्यांचें सत्व जसें त्यांत कायम राहतें तसें त्याचें पवित्र बीजरूप सत्व कायम राहील.

परमेश्वर म्हणतो, हें सफळ व्हावयाचें नाहीं, हें घडावयाचें
नाहीं. ८ अरामाचें शीर दिमिष्क व दिमिष्काचें शीर
रसीन; पांसष्ट वर्षें झालीं नाहींत तोंच एफ्राईम भंग
पावेल व त्याचें राष्ट्रत्व राहणार नाहीं; ९ एफ्राइमाचें
शीर शोमरोन व शोमरोनाचें शीर रमाल्याचा पुत्र. तुम्ही
भाव ठेवणार नाहीं तर तुमचा निभाव लागणार नाहीं.
१० परमेश्वर आहाजास आणखी म्हणाला: ११ तुझा
देव परमेश्वर याजपाशीं तूं आपणासाठीं चिन्ह माग; तें
खालीं अधोलोकांत असो किंवा वर ऊर्ध्व लोकांत असो.
१२ आहाज म्हणाला, मी मागणार नाहीं, मी परमे-
श्वराची परीक्षा पाहणार नाहीं. १३ तेव्हां तो म्हणाला,
हे दाविदाच्या घराण्या, मी सांगतों तें ऐक: तुम्ही
मनुष्यांस कंटाळा आणितां हें थोडें झालें म्हणून माझ्या
देवासहि कंटाळवितां काय? १४ यास्तव प्रभु स्वत:
तुम्हांस चिन्ह देत आहे; पाहा, कुमारी गर्भवती होऊन
पुत्र प्रसवेल व त्याचें नांव इम्मानुएल ( आमच्यासन्निध
देव ) असें ठेवील. १५ वाईट टाकावें व चांगलें
घ्यावें हें त्यांस समजूं लागलें म्हणजे तो लोणी व मध
यांचें सेवन करील. १६ कारण वाईट टाकावें व
चांगलें घ्यावें हें त्या मुलास समजूं लागण्यापूर्वी ज्या
दोन राजांच्या भीतीनें तूं घाबरला आहेस त्यांचा देश
उजाड होईल. १७ एफ्राईम यहूदापासून वेगळा झाला
तेव्हांपासून आले नाहींत असे दिवस परमेश्वर तुला,
तुझ्या लोकांला व तुझ्या बापाच्या घराण्याला आणील;
म्हणजे अश्शूरच्या राजाला तुजवर आणील.

१८ त्या समयीं असें होईल कीं मिसरी नदीच्या
फाट्यांच्या शेवटांस असलेल्या माशा व अश्शूर
देशांत असलेल्या मधमाशा यांस परमेश्वर शीळ घालून
बोलावील. १९ त्या सगळ्या येऊन खडकाळ खोऱ्यांत,
खडकांच्या कपारींत, सगळ्या कांटेरी झुडपांत व
सर्व कुरणांत उतरतील.

२० त्या नदीपलीकडल्या देशांतील भाड्याच्या
वस्तऱ्यानें, म्हणजे अश्शूरच्या राजाच्या योगानें, प्रभु
डोक्याचे, पायांचे केस मुंडील; तो वस्तरा दाढीहि
काढून टाकील.

२१ त्या समयीं असें होईल कीं एकेक मनुष्य एकेक
कालवड व दोनदोन मेंढ्या पाळील; २२ त्या दूध
पुष्कळ देतील म्हणून तो लोणी खाईल; देशांत
शेष राहिलेला प्रत्येक जण लोणी व मध खाईल.

२३ त्या समयीं असें होईल कीं जेथें जेथें हजार रुपये
किंमतीचे हजार द्राक्षींचे वेल असत तेथें तेथें कांटेकुटे
होतील. २४ तेथें धनुष्यबाण घेऊन लोक जातील;
कारण सगळा देश कंटकमय होईल. २५ ज्या टेकड्यां-
वर कुदळींनीं खणीत त्या सगळ्यांवर कांटेऱ्यांच्या
भीतीनें तूं जाणार नाहींस, तर त्या ठिकाणीं गुरेंढोरें
चरतील व मेंढरेंबकरीं फिरतील.

१ परमेश्वरानें मला म्हटलें, एक मोठी पाटी
८ घेऊन तीवर व्यावहारिक लिपींत असें लिही, महेर-
शालाल-हाश-बज ( लूट त्वरा करिते, पारध घाई
करिते ) याविषयीं. २ उरीया याजक व यबरेख्याचा
पुत्र जखऱ्या हे विश्वासू साक्षी यांस मी साक्षीला ठेवितों.
३ मग मीं संदेष्ट्रीशीं समागम केला; ती गर्भवती होऊन
तिला पुत्र झाला; तेव्हां परमेश्वरानें मला म्हटलें कीं त्याचें
नांव महेर-शालाल-हाश-बज असें ठेव. ४ कारण या
मुलास आई, बाबा, म्हणतां येण्यापूर्वीच अश्शूरच्या
राजापुढें दिमिष्काचें धन व शोमरोनाची लूट म्हणून
घेऊन जातील.

५ परमेश्वरानें मला पुन: म्हटलें, ६ हे लोक संथ-
पणानें वाहणारें शिलोहाचें पाणी धिक्कारितात, आणि
रसीन व रमाल्याचा पुत्र यांच्या सहवासांत आनंद
पावतात; ७ यास्तव प्रभु त्यांजवर फरात नदाच्या
जलाचा प्रबल व विपुल ओघ म्हणजे अश्शूरचा राजा
याचा सर्व दळभार आणील; तो आपलीं सर्व पात्रें
व तीर भरून वाहील; ८ त्याचा पूर यहूदावर येईल;
त्यास बुडवून तो पुढें वाहील; त्याचें पाणी लोकांच्या
गळ्यापर्यंत येईल; हे इम्मानुएला, तो आपले पंख
पसरून तुझी सर्व भूमि व्यापून टाकील.

९ अहो राष्ट्रांनो, दंगल करा, पण तुमचा चुराडा
होईल; पृथ्वीवरील दूरच्या देशांनो, कान देऊन ऐका;

तुम्ही आपली कमर बांधा, पण तुमचा चुराडा होईल;
तुम्ही आपली कमर बांधा, पण तुमचा चुराडा होईल.
१० मसलत करा, पण ती निष्फळ होईल; विचार प्रगट
करा, पण तो टिकणार नाहीं; कारण आम्हांसन्निध[1]
देव आहे. ११ परमेश्वरानें मला आपल्या हातानें
बळकट धरून असें बजावून सांगितलें होतें कीं या
लोकांच्या मार्गानें जाऊं नको. तो म्हणाला, १२ हे लोक
ज्याला बंड म्हणतात त्या सर्वाला बंड बंड म्हणूं नका;
ज्याला ते भितात त्याला भिऊं नका, घाबरूं नका.
१३ तर सेनाधीश परमेश्वरालाच पवित्र माना; त्याचेंच
भय व धाक धरा; १४ म्हणजे तो तुम्हांस पवित्रस्थान
होईल; तथापि इस्राएलाच्या उभय घराण्यांत तो ठेच
लागण्याचा धोंडा व अडखळण्याचा खडक आणि यरु-
शलेमाच्या रहिवाश्यांस पाश व सापळा असा होईल.
१५ त्यांपैकीं बहुत लोक ठेचा खातील, पडतील व आप-
टून छिन्नभिन्न होतील, पाशांत अडकून धरिले जातील.
१६ माझ्या शिष्यांच्या ठायीं ही साक्ष पक्की कर, हें
धर्मशास्त्र मुद्रित कर. १७ परमेश्वर याकोबाच्या घराण्या-
पासून आपलें मुख फिरवितो; त्याची वाट मी पाहतों,
त्याची आशा धरितों. १८ पाहा, मी व परमेश्वरानें मला
दिलेलीं मुलें या आम्हांस सीयोननिवासी सेनाधीश परमे-
श्वरानें इस्राएलांत चिन्हें व उत्पात असीं ठेविलीं आहेत.
१९ ते तुम्हांस म्हणतील, भूतवैद्यांस व छांछूं कर-
णाऱ्या मांत्रिकांस विचारावयास जा; तेव्हां म्हणा,
लोकांनीं आपल्या देवाला विचारूं नये काय ? जीवंतां-
करितां मेलेल्यांस विचारावें काय ? २० धर्मशास्त्र व
विधि यांकडे पाहा ! याप्रमाणें ते न बोलल्यास त्यांकरितां
निश्चयें प्रभातसमय नाहीं. २१ ते कष्टी व क्षुधित होऊन
देशांत भटकतील; आणि असें होईल कीं त्यांस भूक
लागली म्हणजे ते संतापून आपल्या राजाला व
आपल्या देवाला शिव्याशाप देतील; मग आपलीं तोंडें
ते वर करितील; २२ ते पृथ्वीकडे दृष्टि देतील तों
पाहा, संकट, अंधकार व दुःखाचें काहूर त्यांना दिसेल;
ते निबिड काळोखांत लोटले जातील.

९ १ तथापि आतां ज्या भूमींत विपत्ति आहे तेथें हा
अंधकार राहाणार नाहीं. त्यानें मागील काळीं जबुलून
प्रांत व नफताली प्रांत यांची अप्रतिष्ठा केली तरी पुढील
काळीं समुद्रतीरींचा प्रदेश, यार्देनेच्या पलीकडील प्रांत,
विदेशी लोकांचें मंडळ (गालील) यांची तो प्रतिष्ठा
करील. २ अंधकारांत चालणाऱ्या लोकांनीं मोठा
प्रकाश पाहिला आहे; मृत्युच्छायेच्या प्रदेशांत बसणा-
ऱ्यांवर प्रकाश पडला आहे. ३ तूं राष्ट्राची वृद्धि केली
आहे; त्याला महानंदप्राप्ति करून दिली आहे, हंगामाच्या
उत्सवसमयीं करावयाच्या आनंदाप्रमाणें, लूट वांटून
घेणाऱ्या लोकांच्या आनंदाप्रमाणें, ते तुजसमोर आनंद
करितात. ४ कारण मिद्यानाच्या दिवसाप्रमाणें, तूं त्याच्या
भाराचें जूं, त्याच्या खांद्यावरची काठी, त्याजवर जुलूम
करणाऱ्याचा सोटा मोडिला आहे. ५ युद्धाच्या गर्दीत
जोडे घातलेल्या योध्यांचे जोडे व रक्तानें भरलेलीं
वस्त्रें हीं जाळण्यासाठीं अग्नीला सर्पण झालीं आहेत.
६ कारण आम्हांसाठीं बाल जन्मला आहे, आम्हांस
पुत्र दिला आहे; त्याच्या खांद्यांवर सत्ता राहील;
त्याला अद्भुत मंत्री, समर्थ देव, सनातन पिता,
शांतीचा अधिपति म्हणतील. ७ त्याच्या सत्तावृद्धीला
व शांतीला अंत नसणार; तो दाविदाच्या सिंहासनावर
बसून त्याचें साम्राज्य चालवील आणि तेथून पुढें तें
सर्वकाळ न्यायानें व धर्मानें दृढ व स्थिर करील.
सेनाधीश परमेश्वराचा आवेश हें सिद्धीस नेईल.
८ प्रभूनें याकोबाला संदेश पाठविला असून तो
इस्राएलाच्या ठायीं प्रविष्ट झाला आहे. ९, १० विटा
फुटून पडल्या आहेत, तर आम्ही चिऱ्यांचें बांधकाम
करूं; उंबराचीं झाडें तोडून टाकिलीं आहेत तर त्यांच्या
जागीं गंधसरू लावूं; असें गर्वानें व उद्दामपणानें
म्हणणाऱ्या सर्व लोकांस म्हणजे एफ्राइमास व शोमरोनच्या
रहिवाश्यांस हें कळून येईल. ११ परमेश्वर रसीनाच्या
योध्यांचा त्याजवर वरचष्मा करील, त्याच्या शत्रूंस
उठवील; १२ पूर्वेकडून अराम्यांस व पश्चिमेकडून

१ मुळांतः इम्मानुएल.

पलिष्टयांस उठवील; ते तोंड पसरून इस्राएलास गिळून
टाकितील. इतकें झालें तरी त्याचा क्रोध शमला नाहीं,
त्याचा हात अजून उगारलेला आहे.
१३ तथापि लोक आपलें ताडण करणाऱ्याकडे
फिरत नाहींत, सेनाधीश परमेश्वराला शरण जात
नाहींत; १४ म्हणून परमेश्वर इस्राएलाचें शीर व
शेपूट, तालवृक्षाची झावळी व लव्हाळा हीं एका
दिवसांत छेदून टाकील. १५ वडील व सन्मान्य पुरुष हा
शीर; असत्य शिक्षण देणारा संदेष्टा हा शेपूट. १६ या
लोकांचे नेते त्यास बहकविणारे झाले आहेत; व त्यांचे
अनुगामी ग्रासून टाकण्यांत आले आहेत. १७ यामुळें
प्रभु त्यांच्या तरुणांवर प्रसन्न होत नाहीं; त्यांचे अनाथ
व विधवा यांचा त्याला कळवळा येत नाहीं; कारण ते
सर्व अधर्मी व कुकर्मी आहेत; प्रत्येक मुखांतून
धर्मनिंदा निघते. इतकें झालें तरी त्याचा क्रोध शमला
नाहीं, त्याचा हात अजून उगारलेला आहे.
१८ दुष्टता अग्नीसारखी पेट घेते; ती कांटेकुटे व
कांटेझुडपें खाऊन टाकिते; वनांतील झाडींतहि ती पेट
घेते; त्यांच्या धुराचा लोळ वर चढतो. १९ सेनाधीश
परमेश्वराच्या क्रोधानें भूमि जळून खाक झाली आहे;
लोकहि जसे काय अग्नीला सर्पण झाले आहेत;
आपल्या भावालाहि कोणी सोडीत नाहीं. २० ते
उजवीकडे लचके तोडितात तरी भुकेलेले राहतात;
ते डावीकडे खातात तरी त्यांची तृप्ति होत नाहीं;
प्रत्येक जण आपल्याच बाहूचें मांस खातो; २१ मनश्शे
एफ्राइमाला खातो, आणि एफ्राईम मनश्शाला खातो;
ते दोघे मिळून यहूदाचा विरोध करितात. इतकें
झालें तरी त्याचा क्रोध शमला नाहीं, त्याचा हात
अजून उगारलेला आहे.

१० १ जे अन्यायाचे निर्णय करितात व जे
लेखक उपद्रवकारक ठराव लिहितात त्यांस
धिक्कार असो. २ ते दाद मागणाऱ्या दुबळ्यांस
धुडकावून लावितात व माझ्या प्रजेंतल्या गरिबांचे हक्क
बुडवितात; ते विधवांस लुटितात व पोरक्यांस
नागवितात. ३ पारिपत्याच्या दिवशीं व दुरून नाश-
कारक वादळ येईल तेव्हां काय कराल? तुम्ही
साहाय्यार्थ कोणाकडे धाव घ्याल? आपलें ऐश्वर्य कोठें
ठेवून जाल? ४ बंदिवानांच्या पायांशीं दबून राहणें व
वध झालेल्यांच्या खालीं पडून राहणें याशिवाय त्यांना
दुसरी गति नाहीं. इतकें झालें तरी त्याचा क्रोध शमला
नाहीं, त्याचा हात अजून उगारलेला आहे.

५ जो माझ्या क्रोधाची काठी आहे, ज्याच्या
हातांतील सोटा माझा कहर आहे त्या अश्शूरास धिक्कार असो.
६ मी त्यास अधर्मी राष्ट्रावर पाठवीन. माझ्या क्रोधास पात्र
झालेल्या लोकांची लूट हरण करावी, त्यांनीं लुबाडलेल्या
मत्तेचा अपहार करावा व त्यांस रस्त्यांवरील
चिखलाप्रमाणें तुडवावें, अशी त्यांच्यासंबंधानें त्यास
आज्ञा करीन. ७ तथापि त्याचा विचार कांहीं असा
नाहीं, त्याच्या मनाचा समज असा नाहीं; कारण केवळ
नासधूस करावी, बहुत राष्ट्रांची कत्तल करावी हेंच
त्याच्या मनांत आहे. ८ तो म्हणतो, माझे सर्व सरदार
राजे नाहींत काय? ९ कालनो कर्कमीशासारखें, हमाथ
अर्पादासारखें, व शोमरोन दिमिष्कासारखें नाहीं काय?
१० मूर्तिपरायण राज्यें माझ्या हातीं लागलीं आहेत;
त्यांच्या कोरीव मूर्ति तर यरुशलेम व शोमरोन
यांच्या मूर्तीपेक्षां अधिक होत्या; ११ म्हणून शोमरोन
व त्यांतील मूर्ति यांचें मीं केलें तसें यरुशलेम व त्यांतील
मूर्ति यांचें मी करणार नाहीं काय?
१२ यास्तव प्रभूनें सीयोन डोंगर व यरुशलेम यां-
संबंधनें आपलें समग्र कार्य समाप्त केल्यावर असें होईल
कीं अश्शूरचा राजा याच्या मनांतील गर्वाचा परिणाम
व त्याच्या उन्मत्त दृष्टीचा दिमाख यांचा बदला मी
घेईन. १३ कारण तो म्हणतो, माझ्याच बाहुबलानें व
माझ्या स्वतांच्या अकलेनें हें मीं केलें आहे; मी चतुर
आहें; मीं राष्ट्रांच्या सीमा फिरविल्या आहेत व त्यांचीं
भांडारें लुटिलीं आहेत; बलाढ्य वीराप्रमाणें मीं तक्तांवर
बसलेल्यांस ओढून काढिलें आहे; १४ पक्ष्याच्या कोट्या-
प्रमाणें राष्ट्रांचें धन माझ्या हातीं लागलें आहे; पक्ष्यांनीं
टाकून दिलेलीं अंडीं कोणी गोळा करितो त्याप्रमाणें

सर्व पृथ्वी मीं हस्तगत केली आहे; तेव्हां कोणीं पंख
फडफडाविले नाहींत, तोंड उघडिलें नाहीं, चिवचिव
केलें नाहीं. १५ कुऱ्हाडीनें तोडणाऱ्यापुढें कुऱ्हाड
घमेंड करील काय? करवत, आपणास चालविणाऱ्या-
पुढें, आढ्यता मिरवील काय? सोट्यानें, आपणास
हातीं धरणाऱ्यास, गरगर फिरवावें; काष्ठानें, काष्ठेतरास
उचलावें; तसें हें आहे.

१६ यास्तव प्रभु, सेनाधीश प्रभु, त्याच्या पुष्ट जनांस
रोडपणा आणील; त्याच्या वैभवाखालीं, अग्निज्वाले-
सारखी ज्वाला भडकेल. १७ इस्राएलाची ज्योति अग्नि
होईल, त्याचा जो पवित्र प्रभु तो ज्वाला होईल; एका
दिवसांत त्याचे कांटेकुटे व कांटेझुडपें तो जाळून खाक
करील. १८ तो त्याच्या वनोपवनांचा देह व आत्मा
यांची शोभा नष्ट करील. रोगी क्षीण होत जातो
त्याप्रमाणें त्याची स्थिति होईल. १९ त्याचे वनवृक्ष
थोडे उरतील, ते मुलासहि टिपतां येतील.

२० त्या समयीं असे होईल कीं इस्राएलाचा अवशेष,
याकोबाच्या घराण्यांतील बचावलेले, आपणांस ताडण
करणाऱ्याचा यापुढें आश्रय धरून राहणार नाहींत; तर
परमेश्वराचा, इस्राएलाच्या पवित्र प्रभूचा, आश्रय ते
खऱ्या मनानें करितील. २१ अवशेष, याकोबाचा अव-
शेष, समर्थ देवाकडे परत येईल. २२ कारण हे इस्रा-
एला, तुझे लोक समुद्राच्या रेतीइतके असले तरी त्यांचा
अवशेष मात्र परत येईल; न्यायानें परिपूर्ण असा
प्रलय नेमिला आहे. २३ कारण प्रभु, सेनाधीश परमे-
श्वर, सर्व देशभर नेमिलेला प्रलय आणीत आहे.

२४ यास्तव प्रभु, सेनाधीश परमेश्वर, म्हणतो, हे
माझे सीयोननिवासी प्रजे, अश्शूर मिसराप्रमाणें तुला
दंडानें ताडन करील व तुजवर सोटा उचलील, तरी
त्याला भिऊं नको. २५ कारण थोडक्याच काळानें तुज-
वरचा माझा कोप शमून माझा क्रोध त्याच्या नाशास प्रवृत्त
होईल. २६ ओरेब खडकाजवळ मिद्यानाची कत्तल
झाली तेव्हांच्याप्रमाणें सेनाधीश परमेश्वर त्याजवर चाबूक
चालवील; तो आपली काठी समुद्रावर उगारील, तो
तो मिसराप्रमाणें त्यावर उगारील. २७ त्या समयीं असें
होईल कीं तुझ्या खांद्यावरून त्याचा भार व तुझ्या
मानेवरून त्याचें जूं निघेल आणि तुझ्या पुष्टतेमुळें
तें मोडून जाईल.

२८ तो अयाथास आला, मिग्रोनांतून पार गेला;
मिखमाशांत त्यानें आपला सरंजाम ठेविला आहे;
२९ ते घाटांतून पार गेले; गेबा येथें मुक्काम करूं असें
ते म्हणत आहेत; रामा थरथर कांपत आहे; शौलाचा
गिबा पळून जात आहे. ३० गल्लीमेच्या कन्ये,
मोठ्यानें हेल काढून ओरड! हे लईशा, कान दे!
बिचारें अनाथोथ! ३१ मदमेना पळत आहे; गेबी-
मांतील रहिवासी पळ काढण्यासाठीं आपली मालमत्ता
गोळा करीत आहेत. ३२ त्याचा आजचा मुक्काम
नोबास आहे; तो सीयोनकन्येच्या डोंगराला, यरुशलेमा-
च्या टेंकडीला, हातानें धमकावीत आहे.

३३ पाहा, प्रभु सेनाधीश परमेश्वर खांद्या भयंकर
झपाट्यानें छाटीत आहे; उंच वाढलेलीं खोडें तोडून
टाकिलीं जात आहेत; उन्नत नीच होत आहेत. ३४ तो
लोखंडानें वनांतलीं झाडें तोडीत आहे, लबानोन
प्रताप्याच्या हातून पतन पावत आहे.

११ १ इशायाच्या बुंधाला धुमारा फुटेल;
त्याच्या मुळांतून फुटलेली शाखा फळ देईल;
२ परमेश्वराचा आत्मा, सुज्ञानाचा व समंजस-
पणाचा आत्मा, सुसंकल्पाचा व सामर्थ्याचा आत्मा,
परमेश्वराच्या ज्ञानाचा व भयाचा आत्मा त्याजवर
राहील; ३ परमेश्वराचें भय त्याला सुगंधमय होईल;
तो डोळ्यांनीं पाहील तेवढ्यावरूनच न्याय करणार नाहीं.
कानांनीं ऐकेल तेवढ्यावरूनच तो निर्णय करणार नाहीं;
४ तर तो दुबळ्यांचा न्याय यथार्थतेनें करील, पृथ्वीवरील
दीनांच्या वादाचा यथार्थ निर्णय करील; तो आपल्या
मुखरूप वेत्रानें पृथ्वीस ताडण करील, आपल्या मुखाच्या
फुंकारानें दुर्जनांचा संहार करील. ५ धार्मिकता त्याचें
वेष्टन व सत्यता त्याचा कमरपट्टा होईल.
६ लांडगा कोकराजवळ राहील, चित्ता करडाजवळ बसेल,
वासरूं, तरुण सिंह व पुष्ट बैल एकत्र राहतील; त्यांस लहान
मूल वळील. ७ गाय व अस्वल एकत्र चरतील; त्यांचे बचे

एकत्र बसतील; सिंह बैलाप्रमाणें कडबा खाईल. ८ तान्हें
बाळ नागाच्या बिळाजवळ खेळेल, थानतुटें मूल
फुरशाच्या बुबुळाला हात लावील. ९ माझ्या सगळ्या
पवित्र डोंगरावर तीं उपद्रव देणार नाहींत व नासधूस
करणार नाहींत; कारण सागर जसा जलपूर्ण आहे तशी
परमेश्वराच्या ज्ञानानें पृथ्वी परिपूर्ण होईल.

१० त्या समयीं असें होईल कीं राष्ट्रांकरितां
ध्वजवत् उभारिलेल्या इशायाच्या धुमाऱ्याला राष्ट्रें
शरण येतील; त्याचें निवासस्थान गौरवयुक्त होईल.

११ त्या समयीं असें होईल कीं अश्शूर, मिसर,
पथ्रोस, कूश, एलाम, शिनार, हमाथ व समुद्रतीरींचे
प्रदेश येथून प्रभु आपल्या लोकांचा अवशेष आपल्या
हातानें खरेदी करून दुसऱ्यानें सोडवील. १२ तो
राष्ट्रांसाठीं निशाण उभारील, व पृथ्वीच्या चारी दिशां-
कडून इस्राएलांतल्या घालवून दिलेल्यांस एकवट
करील व यहूदांतल्या परागंदा झालेल्यांस गोळा
करील. १३ एफ्राइमाचा मत्सर नाहींसा होईल,
यहूद्याचे वैरी उच्छेद पावतील, एफ्राइम यहूद्याचा हेवा
करणार नाहीं व यहूदा एफ्राइमाशीं विरोध करणार
नाहीं. १४ ते पश्चिमेकडे पलिष्ट्यांच्या खांद्यावर
( खालाटीवर ) झडप घालितील; ते एकत्र होऊन पूर्व-
देशीयांस लुटितील; अदोम व मवाब यांस हस्तगत
करितील; अम्मोनी त्यांस वश होतील. १५ परमेश्वर
मिसरी समुद्राची खाडी नष्ट करील; तो आपला
उष्ण श्वास सोडून आपला हात नदावर ( फरातावर )
परजील; त्यावर प्रहार करून त्याचे सात फाटे करील;
त्यांवरून लोकांस जोडे घालून जातां येईसें करील.
१६ मिसर देशांतून निघण्याच्या वेळीं इस्राएलास
जसा मार्ग झाला तसा त्याच्या अवशिष्ट लोकांस
अश्शुरांतून निघून जाण्यास हमरस्ता होईल.

१२ १ त्या दिवशीं तूं म्हणशील, हे परमेश्वरा,
तुझा मी धन्यवाद करितों, कारण तूं मजवर
कोप केला होता, तो तुझा कोप शमला आहे व
तूं माझें सांत्वन केलें आहे. २ पाहा, देव माझें
तारण आहे; मी भाव धरितों, भीत नाहीं; कारण
प्रभु परमेश्वर माझें बल व गीत आहे; तो मला तारण
झाला आहे. ३ तेव्हां तुम्ही तारणकूपांतून उल्हासानें
पाणी काढाल. ४ त्या दिवशीं तुम्ही म्हणाल, परमे-
श्वराचा धन्यवाद करा, त्याच्या नामाचा जयघोष करा,
राष्ट्रांमध्यें त्याचीं कृत्यें विदित करा, त्याचें नाम थोर
आहे अशी वाखाणणी करा. ५ परमेश्वरापुढें गायन
करा कारण त्याची करणी प्रतापमय आहे; हें सर्व
पृथ्वीवर विदित होवो. ६ अगे सीयोननिवासिनी,
जयघोष कर, गजर कर; कां कीं इस्राएलाचा पवित्र प्रभु
तुझ्याठायीं थोर आहे.

१ बाबेलाविषयीं आमोजाचा पुत्र यशया
१३ याला दृष्टांतांत प्राप्त झालेली देववाणी :

२ उघड्या डोंगरावर ध्वज उभारा, लोकांस
मोठ्यानें हाका मारा, हातानें खुणावा म्हणजे ते सर-
दारांच्या वेशींत प्रवेश करितील. ३ मीं आपल्या पवित्र
केलेल्या जनांस आज्ञा केली आहे, माझ्या क्रोधास्तव
माझ्या वीरांस, अभिमानानें उल्लास पावणाऱ्या माझ्या
जनांस मीं बोलाविलें आहे. ४ ऐका, एखाद्या मोठ्या
राष्ट्राच्यासारखा गोंगाट डोंगरांवर होत आहे, एकत्र
झालेल्या राष्ट्रसमूहाचा गलबला होत आहे; सेनाधीश परमे-
श्वर युद्धासाठीं सैन्याची पाहणी करीत आहे. ५ ते दूर
देशांतून, दिगंतांपासून येत आहेत; परमेश्वर व त्याचीं
क्रोधशस्त्रें देशाचा विध्वंस करावयास येत आहेत.

६ आक्रोश करा; परमेश्वराचा दिवस समीप आला
आहे; सर्वसमर्थाकडून हा एक विनाशच येत आहे.
७ ह्यामुळें सर्वांचे बाहु गळले आहेत, प्रत्येकाचें हृदय
विरघळलें आहे; ८ ते अगदीं घाबरले आहेत; त्यांस
पेटके व वेदना घेरीत आहेत; प्रसूत होणाऱ्या स्त्री-
प्रमाणें ते वेणा देत आहेत; एकमेकांकडे टकमक पाहत
आहेत, त्यांचीं मुखें काळवंडलीं आहेत. ९ पाहा,
रोष व तीव्र क्रोध यांनीं दुःखकर झालेला असा परमे-
श्वराचा दिवस येत आहे; तो देश उजाड करून सोडील,
त्यांतील पातक्यांचा संहार करील. १० आकाशांतील

१ मुळांत : याह, याव्हे

तारे व नक्षत्रें आपला प्रकाश देणार नाहींत; सूर्य
उदय पावतांच काळाठिक्कर पडेल, चंद्र आपला प्रकाश
देणार नाहीं. ११ मी जगाचें त्याच्या दुष्टतेबद्दल व
पातक्यांचें त्यांच्या अन्यायाबद्दल पारिपत्य करीन;
गर्विष्ठांचा दिमाख बंद करीन, जुलम्यांचा तोरा उतर-
वीन. १२ पुरुष उत्कृष्ट सोन्याहून दुर्मिळ करीन, मानव
ओफीराच्या शुद्ध सोन्याहून दुर्मिळ करीन. १३ मी
आकाश कंपायमान करीन व पृथ्वी स्थानभ्रष्ट होईल;
सेनाधीश परमेश्वराचा कोप व त्याच्या तीव्र क्रोधाचा
दिवस ह्यांमुळें असें होईल. १४ हुसकलेला हरिण,
मेंढपाळावांचून मेंढरांचा कळप, ह्यांसारखे ते होतील;
प्रत्येक जण आपल्या लोकांकडे धाव घेईल; प्रत्येक
जण आपल्या देशाकडे पळून जाईल. १५ जो कोणी
सांपडेल त्याला भोसकतील; ज्या कोणाला पकडतील
तो तरवारीनें पडेल. १६ त्यांच्या डोळ्यांदेखत त्यांचीं
तान्हीं बाळें ते आपटून मारितील; त्यांचीं घरें लुट-
तील; त्यांच्या स्त्रिया भ्रष्ट करितील.

१७ पाहा, मी त्यांजवर मेदी लोक उठवीन, ते रुप्याची
परवा करणार नाहींत व सोन्यानें खुष होणार नाहींत.
१८ त्यांचीं धनुष्यें तरुणांस पाडितील; ते पोटच्या
फळावर दया करणार नाहींत; त्यांचे नेत्र मुलांची
कींव करणार नाहींत. १९ तेव्हां राष्ट्रांचा मुकुटमणि,
खास्दी लोकांच्या ऐश्वर्याचें भूषण असा जो बाबेल
त्याची, सदोम व गमोरा यांचा देवानें सत्यनाश केला
तेव्हांच्यासारखी, स्थिति होईल. २० त्यांत पुनः
कधीं वस्ती होणार नाहीं, पिढ्यानपिढ्या त्यांत कोणी
राहणार नाहीं; अरब आपले तंबू तेथें ठोकणार नाहींत;
मेंढपाळ आपले कळप तेथें बसविणार नाहींत.
२१ तेथें वनपशु बसतील; त्यांच्या घरांत घुबडें भर-
तील; शहामृग तेथें राहतील; बोकडाच्या रूपाचीं
पिशाचें तेथें नाचतील; २२ रानकुत्रीं त्यांच्या किल्ल्यांत,
कोल्हीं त्यांच्या मनोरम महालांत ओरडतील; तिचा
काळ जवळ आला आहे; तिचे आयुर्दिन वाढणार नाहींत.

१४ १ कारण याकोबावर परमेश्वर दया
करील; तो पुनः इस्राएलास निवडून घेईल,
त्यांस त्यांच्या स्वदेशांत वसवील; त्यांला परके
येऊन मिळतील; ते याकोबाच्या घराण्याशीं लगटून
राहतील. २ विदेशी लोक त्यांस नेऊन स्वस्थानीं
पोंचवितील; आणि इस्राएलाचें घराणें परमेश्वराच्या
भूमींत त्यांस दासदासी करून ठेवील; ज्यांनीं त्यांस
बंदिवान करून नेलें होतें त्यांस ते बंदींत ठेवितील;
असे ते आपणांस पीडणाऱ्यांवर स्वामित्व करितील.

३ ज्या दिवशीं तुझी पीडा, चिंता व तुजवर लाद-
लेलें कठीण दास्य यांपासून परमेश्वर तुला आराम देईल,
४ त्या दिवशीं असें होईल कीं बाबेलच्या राजासंबंधानें
हें कवन तूं म्हणशील: पीडणारा कसा नाहींसा झाला!
पिळून काढणारी नगरी कशी नष्ट झाली आहे! ५-६ जो
क्रोधानें लोकांचें सतत ताडण करीत असे, जो कोपानें
अनिवार छळ करून राष्ट्रांवर सत्ता चालवीत असे, तो
दुर्जनांचा सोटा, अधिपतींचा दंड, परमेश्वरानें मोडून
टाकिला आहे. ७ सर्व पृथ्वी विश्राम पावली आहे,
शांत झाली आहे; लोक गाण्याचा गजर करीत आहेत.
८ सरूचीं झाडें व लबानोनावरील गंधसरू तुजमुळें
हर्षित होऊन म्हणतात, तूं पडलास तेव्हांपासून आम्हां-
वर कुऱ्हाड चालविणारा कोणी येत नाहीं. ९ खालीं
अधोलोकांत तुझ्या स्वागतार्थ गडबड उडाली आहे;
तो तुजसाठीं पृथ्वीवरील मरून गेलेल्या सर्व प्रमुखांस
जागृत करीत आहे; राष्ट्रांच्या सर्व राजांस त्यांच्या
त्यांच्या सिंहासनांवरून उठवीत आहे. १० ते सर्व उठून
तुला म्हणतात, तूंहि आम्हांप्रमाणें निर्बळ झाला आहेस
काय? तूं आमच्यासारखा बनला आहेस काय?
११ तुझा डामडौल, तुझ्या सारंग्यांचा नाद अधोलोकांत
उतरत आहे; तुझ्याखालीं कृमींचें अंथरूण झालें आहे,
आणि वरून तुला कीटकांचें पांघरूण झालें आहे.

१२ हे देदीप्यमान ताऱ्या, प्रभातपुत्रा, तूं आकाशांतून
कसा पडलास! राष्ट्रांस लोळविणाऱ्या, तुला धुळींत कसें
टाकिलें! १३ जो तूं आपल्या मनांत म्हणालास, मी
आकाशांत चढेन, देवाच्या तारागणाहून माझें सिंहासन
उंच करीन, उत्तर भागांतील देवसभेच्या पर्वतावर
मी विराजमान होईन; १४ मी मेघांवर आरोहण करीन,
मी परात्परासमान होईन; १५ त्या तुला अधोलोकांत,
गर्तेच्या अधोभागांत टाकिलें आहे. १६ जे तुला पाह-

तील ते तुला निरखून मनांत म्हणतील कीं ज्यानें
पृथ्वी थरथर कांपविली व राज्यें डळमळविलीं तो हाच
का पुरुष? १७ ज्यानें जगाचें रान केलें, त्यांतील
नगरांचा विध्वंस केला, व आपल्या बंदिवानांस मुक्त
करून घरीं जाऊं दिलें नाहीं तो हाच का पुरुष?
१८ राष्ट्रांचे राजे सगळे आपआपल्या घरीं गौरवानें
निद्रिस्त आहेत; १९ पण तुला फेकून दिलेल्या खांदी-
प्रमाणें आपल्या थडग्यापासून दूर झुगारून दिलें आहे;
वधिलेले, तरवारीनें विंधिलेले, गर्तेच्या धोंड्यांमध्यें
पडलेले यांनीं तूं वेष्टिला आहेस. पायांखालीं तुडविलेल्या
मढ्यासारखा तूं झाला आहेस. २० त्यांच्याबरोबर तुला
मूठमाती मिळणार नाहीं, कारण तूं आपल्या देशाची
नासधूस केली व आपल्या प्रजेचा वध केला; कुकर्म्यांच्या
वंशाचें नांव कधीं मागें उरणार नाहीं.

२१ वडिलांच्या दुष्कर्मास्तव त्याच्या पुत्रांसाठीं वधस्थान
सिद्ध करा, म्हणजे ते उदयास येऊन देश जिंकणार नाहींत,
पृथ्वीचा पृष्ठभाग नगरांनीं व्यापून टाकणार नाहींत. २२ मी
त्यांजवर उठेन, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो; बाबेलचें
नांव व अवशेष, त्यांचे पुत्रपौत्र यांचा मी समूळ उच्छेद
करीन असें परमेश्वर म्हणतो. २३ तो साळूचें वतन व
पाणथळे होईल असेंहि मी करीन; नाशरूप झाडूनें मी
त्यास झाडून टाकीन असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.

२४ सेनाधीश परमेश्वर शपथ वाहून म्हणाला आहे
कीं, मीं कल्पिलें तसें होईलच; मीं योजिलें तसें
घडेलच; २५ मी आपल्या देशांत अश्शूरचा चुराडा
करीन, माझ्या पर्वतांवर त्याला पायांखालीं तुडवीन;
तेव्हां त्याचें जूं त्यांजवरून निघेल, त्यांच्या खांद्यांवरून
त्याचें ओझें उतरेल. २६ सर्व पृथ्वीविषयीं योजिलेला
संकल्प हाच आहे; सर्व राष्ट्रांवर उगारिलेला हात हाच
आहे. २७ सेनाधीश परमेश्वरानें संकल्प केला आहे
तो कोणाच्यानें रद्द करवेल? त्याचा हात उगारलेला
आहे तो कोणाच्यानें मागें आणवेल?

२८ आहाज राजा मरण पावला त्या वर्षी ही देव-
वाणी प्राप्त झाली:

२९ हे समग्र पलेशेथा, तुला मारणारा सोटा
मोडला आहे म्हणून आनंद करूं नको, सापाच्या
मुळांतून फुरसें निघेल, त्याचें फळ उडता आग्या
साप होईल. ३० गरिबांतले गरीब पोटभर खातील;
गरजवंत सुखानें झोप घेतील; तुझें मूळ मी क्षुधेनें
मारीन; व तुझा अवशेष वधितील. ३१ अगे वेशी,
हायहाय कर; अगे नगरी, ओरड; हे पलेशेथा, तूं
सर्वस्वीं वितळून जाशील; कारण उत्तरेकडून धूर येत
आहे; त्याच्या सैन्यापैकीं कोणी चुकून मागें राहणार नाहीं.

३२ राष्ट्राच्या जासुदांस काय उत्तर द्यावें? परमेश्वरानें
सीयोन स्थापिलें आहे; त्याच्या लोकांपैकीं दीनदुर्बळ
त्यांत आश्रय करून आहेत.

१ मवाबाविषयींची देववाणी:

१५ एका रात्रींत मवाबाचें आर उजाड झालें,
नष्ट झालें; एका रात्रींत मवाबाचें कीर उजाड
झालें, नष्ट झालें. २ बईथ व दीबोन उच्चस्थानीं विलाप
करण्यास चढून जात आहेत; नबो व मेदबा यांवर
जाऊन मवाब आक्रंदन करीत आहे; सर्वांचीं डोकीं
मुंडिलेलीं आहेत; प्रत्येकाची दाढी काढिलेली आहे.
३ आपल्या पेठांत ते गोणताट नेसून आहेत; आपल्या
धाब्यांवर व चौकांत ते सगळे आकांत करीत आहेत,
अश्रु ढाळीत आहेत. ४ हेशबोन व एलाले हीं ओरडत
आहेत; याहसापर्यंत त्यांचा आक्रोश ऐकूं जात आहे;
यास्तव मवाबाचे हत्यारबंद लोक आरोळ्या देत आहेत;
त्याचा जीव घाबरा झाला आहे; ५ माझें हृदय मवाबा-
विषयीं आक्रोश करीत आहे; त्याचे सरदार सोअर
नगर, एगलाथ-शलिशीया येथवर पळून गेले आहेत;
लहीथ चढणीवर ते रडतरडत चढत आहेत;
होरोनाइमाच्या वाटेवर नाश झाल्याची आरोळी ते
करीत आहेत. ६ निम्रीमाचें पाणी आटलें आहे; गवत
वाळून गेलें आहे; झाडपाला सुकून गेला आहे; हिरवळ

१ अथवा: पळलेले लोक तीन वर्षांच्या कालवडी-
प्रमाणें सोअरापर्यंत निघून गेले आहेत-

नाहींसी झाली आहे. ७ यास्तव त्यांनीं वांचविलेलें व
सांठविलेलें धन ते वाळुंजांच्या ओहळापलीकडे नेत
आहेत. ८ कारण मवाबाच्या प्रदेशांत चोहोंकडे आरडा-
ओरड झाली आहे; त्यांचें आक्रंदन एग्लाइमापर्यंत,
त्यांचा आक्रोश बैर-एलीमापर्यंत ऐकूं जात आहे.
९ दीमोनाचे जलप्रवाह रक्तानें भरले आहेत; आणि
दीमोनावर मी आणखी अरिष्ट आणणार; मवाबाच्या
वांचलेल्या लोकांवर व देशांतील अवशिष्ट लोकांवर
एक सिंह आणणार.

१ अधिपतीस पाठवावयाच्या कोकरांचा नज-
१६ राणा तुम्ही रानाजवळच्या सेला येथून सीयोन-
कन्येच्या पर्वताकडे रवाना करा. २ कारण
कोट्यांतून उडविलेल्या भटकणाऱ्या पाखरांप्रमाणें
मवाबाच्या कन्या आर्णोनच्या उतारांजवळ भटकतील.
३ मसलत दे, निर्णय कर; भरदुपारीं आपली छाया
रात्रीसारखी कर; घालवून दिलेल्यांस लपीव, भटक-
णाऱ्यांस दाखवून देऊं नको. ४ माझ्या घालवून दिले-
ल्यांस तुजजवळ राहूं दे; मवाबाला लुटारूंपासून
आसरा हो; कारण पिळून काढणारा नष्ट झाला आहे;
नासधूस बंद झाली आहे; पायमल्ली करणारे देशांतून
नाहींतसे झाले आहेत. ५ वात्सल्याचें सिंहासन स्थापिलें
आहे; त्यावर दाविदाच्या डेऱ्यांत कोणीएक सत्यनिष्ठ
विराजमान होईल; तो न्याय करणारा, न्यायप्रिय,
धार्मिकतेंत निपुण असा असेल.

६ मवाबाच्या गर्वाविषयीं आम्ही ऐकून आहों; तो
मोठा अभिमानी आहे; त्याचा उन्मत्तपणा, त्याचा
गर्व व त्याचा क्रोध, यांविषयीं आम्ही ऐकून आहों;
त्याची बढाई निरर्थक आहे. ७ यास्तव मवाब
स्वतःविषयीं विलाप करील, सर्व लोक शोक करितील,
कीर-हरेसेथाच्या मनुकांच्या केकांविषयीं आम्ही निराश
होऊन तुम्ही उसासा टाकाल. ८ हेशबोनाचे मळे व
सिब्मेच्या द्राक्षलता हीं सुकून गेलीं आहेत; राष्ट्रांच्या
अधिपतींनी तिच्या लतांचे अंकुर तुडवून टाकिले आहेत.
ती याजेरापर्यंत विस्तारली होती, ती रानातहि पसरली
होती; तिच्या फांद्या चोहोंकडे पसरून समुद्रापलीकडे
गेल्या होत्या; ९ म्हणून मी याजेराच्या विलापाप्रमाणें
सिब्मेच्या द्राक्षलतेविषयीं विलाप करितों; हे हेशबोना,
हे एलाले, मी आपल्या अश्रूंनीं तुम्हांला न्हाऊं घालीन.
कारण उन्हाळ्यांतील तुझ्या फळांच्या व पिकांच्या
हंगामाच्या वेळीं रणशब्द कानीं पडला. १० सुपीक
मळ्यांतला आनंद व उल्लास नाहींसा झाला; द्राक्षीच्या
मळ्यांत गायनाचा व हर्षाचा गजर होत नाहीं; द्राक्ष-
कुंडांत द्राक्षें तुडवून कोणी द्राक्षारस काढीत नाहीं;
द्राक्षांच्या हंगामांतला उत्सवशब्द मीं बंद केला
आहे. ११ ह्यामुळें माझी आंतडीं मवाबासाठीं, माझें
काळीज कीर-हरेसासाठीं वीणेप्रमाणें नाद करीत आहे.
१२ मवाब देवदर्शन घेईल आणि उंच स्थानीं राहून
राहून थकेल; देवघरांत प्रार्थना करावयास जाईल तरी
त्याचें कांहीं चालणार नाहीं.

१३ मवाबाविषयीं गतकाळीं परमेश्वरानें जें वचन
विदित केलें तें हें: १४ आतां परमेश्वर म्हणतो,
सालदाराच्या मुदतीप्रमाणें तीन वर्षांत मवाबाचें वैभव
त्याच्या सगळ्या मोठ्या समुदायासह क्षीण होईल;
त्याचा अवशेष राहील, पण तो अत्यल्प; म्हणण्यासारखा
नसणार.

१ दिमिष्काविषयींची देववाणी:
१७ पाहा, दिमिष्क हें नगर या नांवाला मुकलें
आहे; तें मोडतोडीचा ढीग बनलें आहे.
२ अरोएराचीं नगरें लोक सोडून गेले आहेत; तीं गुरांच्या
कळपांचीं ठिकाणें झालीं आहेत. ते तेथें बसतात;
त्यांस भेडाविणारा कोणी नाहीं. ३ एफ्राइमाची
तटबंदी, दिमिष्काचें राज्य व अरामाचा अवशेष हीं
नाहींतशीं होतील; इस्राएलाच्या वैभवाची गत झाली
तशी त्यांची होईल, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.
४ त्या समयीं असें होईल कीं याकोबाचें वैभव
क्षय पावेल, त्याचा पुष्ट देह रोड होईल. ५ कापणी
करणारा उभ्या पिकाची कवळी धरून आपल्या हातानें
कणसें कापितो तसें होईल; रफाईम खोऱ्यांत कोणी

१ अथवा: कोसळलेल्या पायांविषयीं

कणसें टिपितो तसें होईल. ६ तरी जैतून झाड
हालविलें असतां त्यावर कांहीं फळें शिल्लक राहतात,
वरच्या फांदीवर दोनतीन व त्याच्या अगदीं बाहेर
पसरलेल्या बहुफल शाखांवर चारपांच राहतात, तसा
त्यांचा शेष राहील, असें परमेश्वर इस्राएलाचा देव
म्हणतो. ७ त्या समयीं मनुष्य आपल्या उत्पन्नकर्त्याकडे
पाहील; त्याचे डोळे इस्राएलाच्या पवित्र प्रभूकडे लागतील.
८ आपल्या हातांनीं बनविलेल्या वेद्यांकडे तो पाहणार
नाहीं; आपल्या बोटांनीं घडिलेल्या अशेरामूर्ति व सूर्य-
मूर्ति यांकडे तो पाहणार नाहीं. ९ त्या समयीं इस्राएलाच्या
भीतीस्तव सोडून दिलेल्या व उद्ध्वस्त झालेल्या वनांतील
आणि डोंगराच्या माथ्यावरील स्थलांप्रमाणें त्याचीं तट-
बंदीचीं नगरें होतील; तीं उजाड होतील. १० कारण
तूं आपल्या तारणकर्त्या देवाला विसरलास व आपल्या
आश्रयाच्या दुर्गाचें स्मरण केलें नाहीं; म्हणून तूं मनो-
रम झाडांची लागवड केली व परदेशीय द्राक्षलतेचीं
कलमें लाविलीं; ११ तीं तूं लाविलीं त्या दिवशीं त्यांला
तूं कुंपण घातलें व लाविलेलें बीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं
फुलावें असें केलें; पण त्याचा हंगाम दुःखाच्या व
दुःसह क्लेशाच्या दिवशीं केराचा ढीग होईल.

१२ अरेरे, बहुत राष्ट्रांचा केवढा हा गलबला!
समुद्राच्या गर्जनेसारखा ते गलबला करितात; केवढी ही
राष्ट्रांची खळबळ! ती महापुराच्या खळखळीसारखी
खळबळ करितात; १३ राष्ट्रें महापुराच्या खळखळीसारखी
खळबळ करितात; परंतु तो त्या खळबळीस प्रतिरोध
करील व ती नाहींशी होईल; डोंगरांवरचें भूस व वाव-
टळींतील धूळ हीं वाऱ्यापुढें उडून जातात तशी ती
नष्ट होईल. १४ संध्याकाळीं पाहाल तर थरकांप;
पहाट झाली नाहीं तों तिचा फडशा. जे आम्हांस लुटि-
तात त्यांच्या वांट्याला हें आहे; जे आमचा अपहार
करितात त्यांच्या हिस्साला हें आहे.

१ अथवा: अदोनिस दैवताच्या झाडांची.

२ अथवा: अन्य देवांच्या द्राक्षलतेचीं.

१८ १ अरे, कुशांतील नद्यांपलीकडल्या फड-
फडणाऱ्या पंखांच्या देशा! २ तो पाण्यावर
चालणाऱ्या लव्हाळ्यांच्या नावांतून जलमार्गानें
वकील पाठवितो. शीघ्रगति दूतांनो, त्या उंच बांध्याच्या
व तुळतुळीत अंगाच्या राष्ट्रांकडे जा; ते लोक मूळ-
पासूनच भयंकर आहेत. तें हुकमत चालविणारें व पादा-
क्रांत करणारें राष्ट्र आहे; त्याची भूमि नद्यांनीं विभा-
गिलेली आहे. ३ अहो भूतलवासी अखिल जनहो,
पृथ्वीवरील रहिवाश्यांनो, पर्वतांवर ध्वज उभारण्यांत येईल
तेव्हां तुम्ही पाहा; तुतारी वाजविण्यांत येईल तेव्हां ऐका.
४ परमेश्वरानें मला सांगितलें कीं सूर्य प्रकाशत
असतां स्वच्छ ऊन पडतें व कापणीच्या समयीं
उष्णकाळीं दहिंवरयुक्त अभ्र येतें, तसा मी शांत
राहून आपल्या निवासस्थानांतून अवलोकन करीन.
५ कारण मोहर गळाल्यावर त्याच्या जागीं द्राक्षें येऊन
पिकावयास लागतात तेव्हां हंगामापूर्वी तो कोयत्यांनीं
डहाळ्या छाटील व पसरलेल्या फांद्या तोडून टाकील.
६ डोंगरांवरील अधाशी पक्ष्यांसाठीं व देशांतील
गुरांढोरांसाठीं त्या सर्व पडून राहतील; त्यांवर अधाशी
पक्षी उन्हाळा काढितील आणि देशांतील सर्व गुरेंढोरें
हिंवाळा काढतील. ७ त्या समयीं उंच बांध्याचे व
तुळतुळीत अंगाचे लोक, मूळपासून भयंकर, हुकमत
चालविणारें, पादाक्रांत करणारें, ज्या राष्ट्राची भूमि
नद्यांनीं विभागलेली आहे तें, सेनाधीश परमेश्वराचें
नाम दिलेल्या स्थळीं म्हणजे सीयोन डोंगरावर सेनाधीश
परमेश्वराला स्वतांचा नजराणा म्हणून अर्पील.

१९ १ मिसर देशाविषयींची देववाणी:
परमेश्वर शीघ्रगति मेघावर आरूढ होऊन
मिसराकडे येत आहे; मिसरांतील मूर्ति त्याज-
समोर कांपत आहेत आणि मिसराचें हृदय आंतल्या
आंत विरघळत आहे. २ मी मिसरी मिसऱ्यांवर उठवीन;

१ अथवा: परमेश्वराला नजराणा अर्पील.

प्रत्येक आपल्या भावाबरोबर व प्रत्येक आपल्या
शेजाऱ्याबरोबर, नगर नगराशीं, राज्य राज्याशीं लढेल.
३ मिसराच्या अंगाची हिंमत खचेल; त्याची
मसलत मी व्यर्थ करीन; ते मूर्तीला, मांत्रिकांला, भूत-
वैद्यांला व गारुड्यांला प्रश्न विचारितील. ४ मी मिसऱ्यांला
एका कठोर धन्याच्या हातीं देईन; एक उग्र राजा त्यांज-
वर सत्ता करील, असें प्रभु, सेनाधीश परमेश्वर म्हणतो.

५ समुद्राचें पाणी आटून जाईल, नदी आटून
कोरडी होईल. ६ नदीच्या फाट्यांला घाण सुटेल;
मिसर देशाचे कालवे बारीक होऊन सुकून जातील;
बोरू व लव्हाळे सुकून जातील. ७ नील नदीजवळचीं,
नील नदीतीरींचीं कुरणें व नील नदीच्या आसपासची सर्व
शेती वाळून जाईल व तींतील सर्व कांहीं विखरून नाहींसें
होईल. ८ तेव्हां धीवर शोक करितील; नील नदींत गळ
टाकणारे सर्व विलाप करितील; पाण्यावर पाग टाकणारे म्लान
होतील. ९ पिंजलेल्या तागाचें काम करणारे, कापसाचें वीण-
काम करणारे काळवंडतील. १० देशाचे स्तंभ भग्न होतील;
वेतन घेऊन काम करणाऱ्या सर्वांचीं मनें खिन्न होतील.

११ सोअनाचे सरदार, फारोचे शहाणे मंत्री
निव्वळ मूर्ख बनले आहेत; त्यांची मसलत पशूच्या-
समान झाली आहे; मी शहाण्यांचा पुत्र आहें, मी
प्राचीन राजांचा वंशज आहें असें तुम्ही फारोला कसें
म्हणतां ? १२ तुझे शहाणे कोठें आहेत ? त्यांनीं तुला
आतां सांगावें. मिसराविषयीं सेनाधीश परमेश्वरानें
काय संकल्प केला आहे हें त्यास कळूं द्या. १३ सोअनाचे
सरदार मूर्ख बनले आहेत; नोफाचे सरदार फसले
आहेत; मिसरी गोत्रांची कोनशिला असे जे, त्यांनीं
मिसरास बहकविलें आहे. १४ परमेश्वरानें त्यांच्यांत
भ्रांतवृत्ति घातली आहे; मद्यपी वांति करीत लोळतो
तसें त्यांनीं मिसर देशाला त्याच्या प्रत्येक कामांत
बहकविलें आहे. १५ तेव्हां शीर अथवा शेपूट, झावळी
किंवा लव्हाळा यांस करितां येईल असें एकहि कार्य
मिसर देशांत उरणार नाहीं.

१६ त्या काळीं मिसरी लोक बायकांसारखे होतील;
सेनाधीश परमेश्वर त्यांजवर आपला हात उगारील
त्यामुळें ते थरथर कांपतील व भयभीत होतील.
१७ तेव्हां यहूदाची भूमि मिसर देशाला भीतिप्रद
होईल; तिचें मिसर देशाजवळ कोणीं नांव काढिल्यास
तो भयग्रस्त होईल; सेनाधीश परमेश्वरानें जो
संकल्प त्याजविषयीं योजिला आहे त्यामुळें असें होईल.

१८ त्या समयीं मिसर देशाचीं पांच नगरें कनान
देशाची भाषा बोलतील; तीं सेनाधीश परमेश्वरापुढें
एकनिष्ठतेची शपथ वाहतील; त्यांपैकीं एकाला
ईर-हरेस ( विनाश-नगर ) म्हणतील.

१९ त्या काळीं मिसर देशाच्या मध्यें परमेश्वरासाठीं
वेदी होईल, व त्याच्या सीमेवर परमेश्वरासाठीं स्तंभ
होईल. २० हीं मिसर देशांत सेनाधीश परमेश्वराचें
चिन्ह व साक्ष अशीं होतील; आपणांवर जुलूम
करणाऱ्यांमुळें लोक परमेश्वराचा धावा करितील तेव्हां
तो एक उद्धारक व कैवारी पाठवून त्यांस मुक्त करील.
२१ त्या काळीं परमेश्वर मिसऱ्यांस आपली ओळख
देईल व मिसरी परमेश्वराला ओळखतील; ते यज्ञ
व बलि अर्पून त्याची उपासना करितील; ते परमेश्वरास
नवस करितील व तो फेडतील. २२ परमेश्वर
मिसर देशास मारील; मारील व बरेंहि करील; ते
परमेश्वराकडे वळतील आणि तो त्यांची विनंति
ऐकेल व त्यांस बरें करील.

२३ त्या काळीं मिसराहून अश्शुरास हमरस्ता
होईल; अश्शूर मिसरांत व मिसर अश्शुरांत येईल-
जाईल; मिसर अश्शुराबरोबर उपासना करील.

२४ त्या काळीं मिसर व अश्शूर यांचा इस्राएल हा
तिसरा सोबती बनेल व पृथ्वीस मंगलप्रद होईल;
२५ कारण सेनाधीश परमेश्वरानें त्यांस हा आशीर्वाद
दिला : माझी प्रजा मिसर धन्य असो; माझ्या हातची
कृति अश्शूर धन्य असो; आणि माझें वतन इस्राएल
धन्य असो.

२० १ अश्शूर देशाचा राजा सर्गोन याने पाठ-
विलेल्या तर्तान अश्दोदास आला, व त्यानें
अश्दोदाशीं लढून तें हस्तगत केलें. २ त्या

वेळीं आमोजाचा पुत्र यशया याच्या द्वारें परमेश्वर
म्हणाला: जा, आपल्या कंबरेचें गोणताट सोडून टाक,
आपल्या पायांतला जोडा काढ. त्यानें तसें केलें; तो
उघडा व अनवाणी चालला. ३ तेव्हां परमेश्वर
म्हणाला, तीन वर्षेपर्यंत मिसर व कूश यांस चिन्ह व
विस्मय व्हावा म्हणून माझा सेवक यशया उघडा व
अनवाणी चालला; ४ तसा अश्शूर देशाचा राजा मिसरां-
तील बंदिवान व कुशाचे हद्दपार केलेले तरुण व
म्हातारे यांस उघडे, अनवाणी व उघड्या कुल्ल्यांनीं,
मिसर देश फजीत व्हावा म्हणून, घेऊन जाईल. ५ ज्या
कुशाची त्यांनीं अपेक्षा केली व ज्या मिसर देशाची
त्यांना घमेंड वाटली त्याच्यामुळें ते घाबरे
व लज्जित होतील. ६ त्या समयीं या समुद्रतीरचे
रहिवासी म्हणतील, पाहा, अश्शूरच्या राजापासून
आम्हांस सोडवावें म्हणून आम्हीं ज्याची अपेक्षा
केली, ज्याकडे आम्ही साहाय्यार्थ धावलों त्याची
अशी गति झाली; मग आमचा कसा निभाव लागेल?

# २१

१ समुद्रालगतच्या रानाविषयींची देववाणी:
दक्षिणेकडून जशा वावटळी झपाट्यानें
येतात; तसें रानांतून, भयानक देशांतून, अरिष्ट
येतें. २ मला कष्टप्रद दृष्टांत झाला आहे; लुटारू लुटीत
आहे, ठक ठकबाजी करीत आहे. हे एलामा, चढाई
कर; हे मादया, वेढा घाल; त्याच्यामुळें लोक
टाकीत असलेले सर्व उसासे मी थांबवितों. ३ हें
पाहून माझ्या कमरेस कळा लागल्या आहेत; प्रसूत
होणाऱ्या स्त्रीच्या वेदनांप्रमाणें मला वेदना होत
आहेत; मी एवढे आळेपिळे देत आहें कीं मला ऐकूं
येत नाहीं; मी इतका घाबरलों आहें कीं मला दिसत
नाहीं. ४ माझें हृदय धडधडतें; भीतीनें मी त्रस्त
झालों आहें; माझी आवडती वेळ संध्याकाळ मला
कंपित करणारी झाली आहे. ५ ते मेजवानीची
तयारी करितात; ते पहारेकरी ठेवितात; खातात-
पितात; सरदारहो, उठा, ढालीस तेल लावा.
६ परमेश्वर मला म्हणाला, जा, एक पहारेकरी ठेव;
त्याच्या नजरेस पडेल तें त्यानें कळवावें. ७ रथ,
जोडीजोडीनें चालणारे घोडेस्वार, गाढवांवर बसलेले
स्वार व सांडणीस्वार हे त्याच्या दृष्टीस पडले तेव्हां
त्यानें अतिशयित उत्कंठेनें कान लाविले. ८ तो सिंह-
नाद करून म्हणाला, प्रभू, मी दिवसा बुरुजावर एक-
सारखा उभा असतों, रात्रीच्या रात्री आपल्या चौकीवर
काढितों. ९ तर पाहा, पायदळ, जोडीजोडीनें चालणारे
घोडेस्वार येत आहेत; ते उच्च स्वरानें म्हणतात, बाबेल
पडला हो पडला; त्याच्या देवांच्या सर्व मूर्ति जमिनीवर
आपटून फोडिल्या.

१० हे माझ्या मळलेल्या, माझ्या खळ्यांतल्या धान्या,
इस्राएलाचा देव, सेनाधीश परमेश्वर, याजकडून जें मीं
ऐकलें तें मीं तुम्हांस कळविलें आहे.

११ दुमाविषयींची देववाणी:
सेईराहून मला शब्द ऐकूं येतो कीं जागल्या, रात्र
किती झाली? जागल्या, रात्र किती झाली? १२ जागल्या
म्हणाला, पहाट होत आहे, रात्रहि होणार; तुम्हांला
कांहीं विचारावयाचें असेल तर विचारा; परत या.

१३ अरबस्तानाविषयींची देववाणी:
ददानींच्या काफल्यांनो, तुम्हांस अरबस्तानांतील
रानांत रात्र कंठावी लागेल. १४ तान्हेल्यासाठीं पाणी
आणा; तेमा देशांतील रहिवाश्यांनो, पळणाऱ्यांच्या
भेटीस भाकरी घेऊन या. १५ तरवारी, उपसलेल्या
तरवारी, वाकविलेलें धनुष्य व घोर संग्राम यांपासून ते
पळत आहेत. १६ कारण प्रभूनें मला असें सांगितलें
आहे कीं सालदाराच्या मुदतीप्रमाणें एक वर्षाच्या
मुदतींत केदाराचें सर्व वैभव लयास जाईल; १७ केदार
देशांतील धनुर्धारी वीरांची संख्या थोडीच उरेल;
कारण परमेश्वर, इस्राएलाचा देव, हें बोलला आहे.

# २२

१ दृष्टांताचें खोरें याविषयींची देववाणी:
तुम्ही सर्व धाब्यांवर चढलां त्या तुम्हांस काय
झालें? २ हे गोंगाटानें भरलेल्या, गजबजलेल्या

शहरा, उत्सवशब्द करणाऱ्या नगरा, तुझ्यांतील वध पावलेले तरवारीनें वधिले नाहींत, युद्धांत मारिले नाहींत.
३ तुझे सर्व सरदार एकत्र मिळून पळाले; धनुष्यास बाण लाविल्यावांचून त्यांस बद्ध केलें; तुझ्यांतून पळून जात होते त्यांपैकीं जे हातीं लागले त्या सर्वांस एकत्र बांधिलें.
४ याकरितां मी म्हणालों, मजवरून आपली दृष्टि फिरवा; मी मनस्वीं रडणार आहें; माझ्या लोकांच्या कन्येचा नाश झाला आहे; त्याबद्दल माझें सांत्वन करण्याचे श्रम घेऊं नका.

५ कारण दृष्टांताच्या खोऱ्यांत हा दिवस प्रभु, सेनाधीश परमेश्वर यानें गडबडीचा, पायमल्लीचा व घाबरण्याचा असा नेमिलेला आहे; या दिवशीं भिंती मोडतील आणि डोंगरांत आरोळ्यांचा प्रतिध्वनि होईल.
६ एलामानें भाता घेतला आहे. पायदळ व घोडेस्वार हेहि त्याजबरोबर आहेत; कीरानें ढालीची गवसणी काढिली आहे.
७ असें झालें आहे कीं तुझीं उत्कृष्ट खोरीं रथांनीं भरिलीं आहेत, व वेशीसमोर घोडेस्वार रांग धरून उभे आहेत.
८ तेव्हां त्यानें यहूदाची झापड दूर केली; त्या दिवशीं तूं वनगृहांतील शस्त्रागाराकडे दृष्टि लाविली.
९ तुम्हीं दाविदाच्या नगरीचीं भगदाडें पाहिलीं तीं पुष्कळ होतीं; तेव्हां तुम्हीं खालील तळ्यांत पाण्याचा संचय केला.
१० तुम्हीं यरुशलेमांतील घरांची मोजदाद करून तट मजबूत करण्यासाठीं घरें पाडिलीं.
११ जुन्या तळ्याच्या पाण्यासाठीं तुम्हीं दोन भिंतींच्या मध्यें हौद केला; पण ज्यानें हें सर्व केलें त्याजकडे लक्ष दिलें नाहीं; ज्यानें हें पूर्वीच योजिलें त्याजकडे तुम्हीं दृष्टि लाविली नाहीं.

१२ त्या समयीं तुम्हीं रडावें, शोक करावा, केस तोडावे, गोणताट नेसावें असें प्रभु, सेनाधीश परमेश्वर यानें सांगितलें होतें;
१३ पण पाहावें तों आनंद व हर्ष, बैल मारणें व मेंढरें कापणें, मांस खाणें व द्राक्षारस पिणें चाललें आहे; उद्यां मरावयाचें आहे म्हणून खाऊनपिऊन घेऊं या, असें ते म्हणत आहेत.
१४ सेनाधीश परमेश्वरानें माझ्या कानांत सांगितलें आहे कीं तुम्हीं मरावें त्याशिवाय या अन्यायाचें दुसरें प्रायश्चित्त खरोखर नाहीं, असें प्रभु, सेनाधीश परमेश्वर, म्हणतो.

१५ प्रभु, सेनाधीश परमेश्वर असें म्हणाला कीं जा, राजमहालांतील व्यवस्था पाहणारा कारभारी जो शेबना त्याजकडे जाऊन असें म्हण:
१६ येथें तुझें काय आहे? येथें तुझें कोण आहे? तूं आपल्यासाठीं थडगें खोदविलें आहे; उच्चस्थळीं थडगें खोदविलें आहे; खडक कोरून तूं आपणासाठीं जागा केली आहे.
१७ पाहा, परमेश्वर तुला बलवान् पुरुषाप्रमाणें झुगारून देणार आहे; तुला मगरमिठींत धरणार आहे.
१८ तुझी मोट बांधून तुला चेंडूसारखें विस्तृत प्रदेशावर फेकून देणार आहे; अरे स्वामिगृहास कलंक लावणाऱ्या, तेथें तुला मरण येईल; तुझे ऐश्वर्याचे रथ तेथेंच राहतील.
१९ मी तुला तुझ्या हुद्दयावरून काढून टाकीन; तो तुला तुझ्या पदावरून खालीं ओढील.
२० त्या समयीं असें होईल कीं माझा सेवक, हिल्कीयाचा पुत्र एल्याकीम, यास मी बोलावीन;
२१ त्याला तुझा झगा घालीन, त्याला तुझा कमरबंद कसीन, तुझी सत्ता त्याच्या हातीं देईन; तो यरुशलेमकरांचा व यहूदाच्या घराण्याचा पिता होईल.
२२ दाविदाच्या घराण्याची किल्ली त्याच्या खांद्यांवर ठेवीन; त्यानें उघडलें तर कोणी बंद करणार नाहीं; त्यानें बंद केलें तर कोणीं उघडणार नाहीं.
२३ मजबूत ठिकाणच्या खुंटीसारखें मी त्याला स्थिर करीन; म्हणजे तो आपल्या पित्याच्या घराण्यास वैभवशाली आसन होईल.
२४ त्याच्या पित्याच्या घराण्याच्या सर्व शाखा व प्रतिशाखा, पंचपात्रीपासून सुरईपर्यंत सगळीं पात्रें, यांचा भार त्याजवर लटकून राहील.
२५ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, त्या दिवशीं मजबूत ठिकाणीं बसलेली खुंटी ढळेल; ती कापली जाऊन खालीं पडेल व तीवरील भार छेदिला जाईल; कारण परमेश्वर हें बोलला आहे.

१ सोराविषयींची देववाणी:
२३ तार्शीशाच्या गलबतांनो, हायहाय करा; त्याचा विध्वंस झाला आहे; तेथें आतां घरदार किंवा बंदर राहिलें नाहीं; कित्ती लोकांच्या देशांतून त्यांस ही

खबर कळली. २ समुद्रतीरींच्या रहिवाश्यांनो, भीतीनें
स्तब्ध व्हा; समुद्रपर्यटन करणारे सीदोनी व्यापारी तुला
समृद्ध करीत. ३ महासागरावरून आलेलें शीहोर शडीचें
उत्पन्न, व नील नदीचें पीक हीं त्याची मिळकत होतीं;
तें शहर राष्ट्रांचें पेठ झालें होतें. ४ हे सीदोना, फजीत
हो; समुद्र, समुद्रदुर्ग म्हणत आहे: मीं वेणा दिल्या
नाहींत, प्रसवलों नाहीं, तरुणांस वाढविलें नाहीं,
कुमारी लहानाच्या मोठ्या केल्या नाहींत. ५ मिसर
देशास ही बातमी पोहंचेल तेव्हां सोराच्या ह्या
वर्तमानानें ते पेचांत पडतील. ६ तार्शीशास निघून जा;
समुद्रतीरींच्या रहिवाश्यांनो, हायहाय करा. ७ हेंच का
तुमचें आनंदपूर्ण नगर? तें अति प्राचीन काळापासून
वसलेलें आहे; त्याचे पाय वसाहतीसाठीं त्याला दूरदूर
घेऊन गेले.

८ सोर ही राजमुकुटदात्री; तिचे व्यापारी सरदार, तिचे
उदमी जगांतले महाजन; तिच्याविरुद्ध हें कोणी योजिलें?
९ सर्व डामडौलास बट्टा लागावा व जगांतील सर्व महा-
जनांची अप्रतिष्ठा व्हावी, म्हणून हें सेनाधीश परमेश्वरानें
योजिलें आहे. १० अगे तार्शीशकन्ये, तूं नील नदीप्रमाणें
आपली भूमि व्यापून टाक, तुला आतां अटकाव करणारा
कटिबंध राहिला नाहीं. ११ परमेश्वरानें आपला हात
समुद्रावर उगारिला आहे; त्यानें राष्ट्रांस थरथर
कांपविलें आहे; त्यानें कनानासंबंधानें अशी आज्ञा
केली आहे कीं त्याचे दुर्ग नष्ट करावे. १२ तो म्हणाला,
हे कलंक लागलेल्या सीदोनाच्या कुमारिके, तूं इतःपर
उल्लसणार नाहींस; ऊठ, कित्ती लोकांच्या देशांत निघून
जा; तेथेंहि तुला थारा मिळणार नाहीं.

१३ खास्द्यांचा देश पाहा, तो आतां राष्ट्र नाहीं; त्यांची
भूमि अश्शुऱ्यांनीं वनचरांसाठीं सोडिली आहे; त्यांनीं मोर्चे
लावून तिचे महाल जमीनदोस्त करून ती उद्ध्वस्त केली
आहे. १४ तार्शीशच्या गलबतांनो, हायहाय करा. तुमचा दुर्ग
उद्ध्वस्त केला आहे. १५ त्या काळीं असें होईल कीं
एकाच राजाच्या कारकीर्दीच्या इतकी म्हणजे सत्तर वर्षे
सोराची विस्मृति पडेल; सत्तर वर्षे संपल्यावर वेश्येच्या
ह्या गाण्यांत सांगितल्याप्रमाणें सोराचें होईल: १६ स्मरणां-
तून गेलेले वेश्ये, हातीं किनरी घे, शहरभर भटक,
चांगलें वाजीव, पुष्कळ गा, म्हणजे तुझें स्मरण राहील.
१७ हीं सत्तर वर्षे गेल्यावर असें होईल कीं परमेश्वर
सोरेचा समाचार घेईल; ती पुनः आपल्या कमाईकडे
फिरेल; ती भूपृष्ठावरील सर्व राष्ट्रांशीं व्यभिचार करील.
१८ तिच्या व्यापाराची प्राप्ति व तिची कमाई परमे-
श्वराला समर्पून पवित्र होईल; तीं भांडारांत ठेवणार
नाहींत; तिचा संचय करणार नाहींत; तर जे परमे-
श्वराच्या सन्निध असतात त्यांस भरपूर खावयास
मिळावें व त्यांनीं उंची वस्त्रें ल्यावीं म्हणून तिच्या
व्यापाराची प्राप्ति त्यांच्या कामीं लागेल.

२४ १ पाहा, परमेश्वर पृथ्वी रिक्त करीत आहे,
तिला ओसाड करीत आहे, तिला विरूप करीत
आहे व तिच्या रहिवाश्यांची दाणादाण करीत
आहे. २ तेव्हां जशी लोकांची तशी याजकाची,
चाकराची तशी धन्याची, दासीची तशी धनिणीची,
विकत घेणाऱ्याची तशी विकत देणाऱ्याची, सावकाराची
तशी कुळाची, धनकोची तशी ऋणकोची स्थिति
होईल. ३ पृथ्वी अगदीं रिक्त होईल, तिची लूट
होईल; कारण परमेश्वर हें वचन बोलला आहे.
४ पृथ्वी शोकाकुल व कृश झाली आहे; जग झुरून
कृश झालें आहे; पृथ्वीवरील प्रतिष्ठित जन जर्जर झाले
आहेत. ५ पृथ्वी आपल्या रहिवाश्यांकडून भ्रष्ट झाली
आहे, कारण त्यांनीं नियमांचें उल्लंघन केलें आहे,
विधींचें अतिक्रमण केलें आहे आणि सनातन करार
मोडिला आहे. ६ यास्तव पृथ्वी शापानें ग्रासिली
आहे, तिचे रहिवासी पापाचें फळ भोगीत आहेत,
पृथ्वीचे रहिवासी जळून भस्म झाले आहेत, मानव
थोडेच उरले आहेत. ७ नवा द्राक्षारस शोकाकुल
झाला आहे, द्राक्षी करपून गेली आहे, हर्षित मनाचे
सर्व जन उसासे टाकीत आहेत. ८ डफांचा हर्षनाद
बंद पडला आहे, उत्सव करणाऱ्यांचा कल्ला थांबला
आहे, किनरीचा हर्षनाद बंद झाला आहे. ९ ते
गातगात द्राक्षारस पीत नाहींत, मद्यप्यांस मद्य

कडू लागतें. १० व्यवस्थाभ्रष्ट नगर भंग पावलें आहे;
प्रत्येक घर बंद पडलें आहे, कोणाचाहि आंत रिघाव
होत नाहीं. ११ बाहेर रस्त्यांत द्राक्षारसास्तव ओरड
चालली आहे, सर्व उत्सव मावळला आहे, पृथ्वीचा
हर्ष लोपला आहे. १२ नगरांत नुसती ओसाडी
झालेली आहे; वेशीचा भुगाभुगा झाला आहे. १३ जैतून
वृक्ष हालविल्यावर, द्राक्षांचा हंगाम आटोपल्यावर, सरवा
वेचतांना जशीं थोडींशीं फळें राहतात तसें पृथ्वीवरील
राष्ट्रांचें होईल.

१४ ते उच्च स्वरानें गजर करितील, परमेश्वराच्या
प्रभावास्तव समुद्रावरून गजर करितील. १५ यास्तव
उगवतीकडल्या लोकांनो, परमेश्वराचें गौरव करा; समुद्रतीरीं
राहणाऱ्यांनो, इस्राएलाचा देव परमेश्वर याच्या नामाचें
गौरव करा. १६ धार्मिकाची प्रतिष्ठा होवो अशीं गीतें
दिगंतापासून आमच्या कानीं पडलीं.

तेव्हां मी म्हणालों माझा नाश झाला हो नाश झाला !
हाय हाय ! ठकांनीं ठकविलें, ठकांनीं ठकबाजीनें ठकविलें.
१७ हे पृथ्वीवरील रहिवाश्या, दरारा, खाडा व पाश हे
तुजपुढें आहेत; १८ असें होईल कीं दराऱ्याच्या शब्दा-
मुळें पळणारा खाड्यांत पडेल, खाड्यांतून निभावलेला
पाशांत सांपडेल; कारण आकाशाचीं द्वारें उघडलीं आहेत,
पृथ्वीचे आधार हालत आहेत. १९ भूमि अगदीं फाटून
गेली आहे, भूमि साफ फुटून गेली आहे, भूमि अतिशय
हादरून गेली आहे. २० भूमि मद्यप्यासारखी
झोकांड्या खात आहे, माचाळासारखी झुलत आहे;
तिच्या अपराधांचा भार तिला दाबीत आहे; ती
पडेल, आणि पुन: उठणार नाहीं.

२१ त्या समयीं असें होईल कीं उच्च आकाशांत
आकाशस्थांचें सैन्य व भूमीवर भूमीचे राजे यांची
परमेश्वर झडती घेईल. २२ बंदिवानांस जसें अंधार-
खणींत कोंडितात, तसें त्यांस कोंडितील व कारागृहांत
ठेवितील; आणि बहुत दिवसांनीं त्यांची झडती घेतील.
२३ चंद्र तांबूस होईल, सूर्य फिक्का पडेल; कारण
सेनाधीश परमेश्वर सीयोन डोंगरावर व यरुशलेमांत
आपल्या प्रजेंतील वडिलांसमोर वैभवानें राज्य करील.

२५ १ हे परमेश्वरा, तूं माझा देव आहेस; मी
तुझी थोरवी वर्णीन, तुझ्या नामाचें स्तवन
करीन; कारण तूं आश्चर्यकारक कृत्यें केलीं
आहेत; तूं आपले पुरातन संकल्प पूर्ण सत्यशीलतेनें
सिद्धीस नेले आहेत. २ तूं शहराला मोडतोडीचा ढीग
बनविलें आहे; तटबंदीचा गांव धुळीस मिळविला आहे;
विदेश्यांच्या वाड्यांनीं भरलेलें शहर नष्ट केलें आहे; त्याचा
कधीं जीर्णोद्धार होणार नाहीं. ३ यास्तव आडदांड
लोक तुझें गौरव करितील, बलात्कारी लोकांचीं शहरें
तुझें भय धरितील. ४ कारण उग्र लोकांचा झपाटा
जसा वादळाप्रमाणें भिंतीवर आदळावा तसा तूं
दुर्बलास दुर्ग, लाचारास विपत्कालीं आश्रय, वादळांत
निवारा, उन्हांत सावली, असा त्यास झालास.
५ रुक्ष भूमीवर जसा सूर्याचा ताप शांत व्हावा तसा
उग्र लोकांचा गोंगाट तूं शांत करितोस; मेघाच्या
छायेनें जसा सूर्याचा ताप क्षीण होतो तसें बला-
त्काऱ्यांचें जयगीत होतें.

६ सेनाधीश परमेश्वर ह्या डोंगरावर सर्व राष्ट्रांसाठीं
मिष्टान्नाची मेजवानी, राखून ठेविलेल्या द्राक्षारसाची मेज-
वानी करीत आहे; उत्कृष्ट मिष्टान्नाची व राखून ठेविल्यावर
गाळलेल्या द्राक्षारसाची मेजवानी करीत आहे. ७ सर्व
लोकांस झाकून टाकणारें झाकण, सर्व राष्ट्रांस आच्छा-
दून टाकणारें आच्छादन, तो या डोंगरावरून उडवून
देत आहे. ८ तो मृत्यु कायमचा नाहींसा करितो, प्रभु
परमेश्वर सर्वांच्या मुखांवरील अश्रु पुसितो; तो अखिल
पृथ्वीवरून आपल्या लोकांची अप्रतिष्ठा दूर करितो,
कारण परमेश्वर हें बोलला आहे.

९ त्या समयीं ते म्हणतील, पाहा, हा आमचा देव !
याची आम्ही आशा धरून राहिलों; तो आमचें तारण
करील; हाच परमेश्वर आहे; याची आम्ही आशा धरून
राहिलों; त्यानें केलेल्या तारणानें आपण उल्लास व हर्ष
पावूं. १० परमेश्वराचा हात ह्या डोंगरावर राहील, व
जसें शेणाच्या खाईतील रेंद्यांत गवत तुडवितात तसें
मवाबास जागच्या जागीं तुडवितील. ११ जसा पोह-
णारा पोहण्यासाठीं झेपा टाकितो तसा तो तींत झेपा

टाकील; त्यानें आपल्या हाताची करामत कितीहि
चालविली तरी परमेश्वर त्याचा गर्व दडपून टाकील.
१२ तो तुझी उंच तटबंदी पाडून कोसळून टाकील,
आणि जमीनदोस्त करून धुळीस मिळवील.

२६ १ त्या समयीं यहूदा देशांत हें गीत गातील;
आमचें नगर तटबंदी केलेलें आहे; तारण हेंच
त्याचे कोट व तट नेमिले आहेत. २ वेशी
उघडा म्हणजे सत्याचें पालन करणारें धार्मिक राष्ट्र आंत
येईल. ३ ज्याचें मन तुझ्या ठायीं स्थिर झालें आहे
त्यास तूं पूर्ण शांति देतोस, कारण त्याचा भाव तुजवर
असतो. ४ परमेश्वरावर सर्वकाळ भाव ठेवा, कारण
प्रभु परमेश्वर हा सनातन आश्रयदुर्ग आहे.
५ उच्चस्थलीं राहणाऱ्यांस त्यानें खालीं आणिलें आहे;
त्यानें उच्च नगर पाडून टाकिलें आहे, जमीनदोस्त
केलें आहे, धुळीस मिळविलें आहे. ६ तें पायां-
खालीं तुडवितील; गरिबांचे पाय, दीनांचीं पावलें
देखील तें तुडवितील. ७ धार्मिकाचा मार्ग नीट
आहे; तूं न्यायपरायण असून धार्मिकाची गति सरळ
करितोस.

८ हे परमेश्वरा, तुझ्या न्यायमार्गात राहून तुझी आम्ही
प्रतीक्षा करीत आहों; तुझ्या नामाची व तुझ्या स्मरणाची
उत्कंठा आमच्या जिवास लागून राहिली आहे. ९ रात्रीं
माझ्या जिवास तुझी उत्कंठा लागली; मीं अगदीं अंतःकरण-
पूर्वक तुझा शोध करीन; कारण तुझीं न्यायकृत्यें पृथ्वीवर
होतात तेव्हां जगांत राहणारे धार्मिकता शिकतात. १०
दुर्जनावर कृपा केली तरी तो नीति शिकावयाचा नाहीं;
धर्मराज्यांत देखील तो अधर्म करील; परमेश्वराचें
ऐश्वर्य त्याला दिसावयाचें नाहीं.

११ हे परमेश्वरा, तुझा हात वर झाला तरी त्यांनीं
पाहिलें नाहीं. लोकांविषयींची तुझी आस्था पाहून ते
फजीत होतील; अग्नि तुझ्या शत्रूंस ग्रासील. १२ हे
परमेश्वरा, आम्हांसाठीं तूं शांतता स्थापीत करिशील;
कारण तूं आम्हांसाठीं आमचीं सर्व कार्यें साधिलीं
आहेत. १३ हे आमच्या देवा, परमेश्वरा, तुझ्याहून
अन्य प्रभूंनीं आम्हांवर सत्ता चालविली होती, पण
तुझ्याच द्वारें आम्ही तुझें नाम स्तवितों. १४ मृत
जीवंत होत नसतात, प्रेतें उठत नसतात, तद्वत् तूं त्यांची
झडती घेऊन त्यांचा विध्वंस केला आहे, त्यांचें
स्मरण अगदीं नाहींसें केलें आहे. १५ तूं राष्ट्राची वाढ
केली आहे, हे परमेश्वरा, तूं राष्ट्राची वाढ केली आहे;
तूं आपला महिमा दाखविला आहे; तूं देशाच्या चतुः-
सीमा वाढविल्या आहेत.

१६ हे परमेश्वरा, संकटाच्या वेळीं त्यांनीं तुजकडे दृष्टि
फिरविली; त्यांस तुजकडून शिक्षा झाली तेव्हां त्यांनीं
मंद स्वरानें आपलें हृद्गत तुला कळविलें. १७ प्रसूति-
काळ जवळ आलेली गरोदर स्त्री जशी वेणा देते व
वेदनांनीं ओरडते तसे, हे परमेश्वरा, तुझ्या दृष्टीसमोर
आम्ही झालों आहों. १८ आम्ही गरोदर होतों, आम्हीं
वेणा दिल्या, पण आम्ही जसे काय वारा प्रसवलों;
आम्हीं देशाचा कांहीं उद्धार केला नाहीं; देशांत वस्ती
करावयास कोणी जन्म पावले नाहींत. १९ तुझे मृत
जीवंत होतील, माझ्या (लोकांचीं) प्रेतें उठतील.
मातीस मिळालेल्यांनो, जागृत व्हा, गजर करा; कारण
तुजवरील दहिंवर, हें प्रभातीचें जीवनदायी दहिंवर
आहे; भूमि प्रेतें बाहेर टाकील.

२० चला, माझ्या लोकांनो, आपआपल्या खोल्यांत
जा, दारें लावून घ्या; क्रोधाचा झपाटा निघून जाई-
पर्यंत थोडा वेळ लपून राहा. २१ कारण, पाहा,
परमेश्वर पृथ्वीवरील रहिवाश्यांना त्यांच्या पापास्तव
शासन करण्यास आपल्या स्थानाहून निघाला आहे.
शोषलेलें रक्त पृथ्वी प्रगट करील, वधिलेल्यांस ती
यापुढें झाकून ठेवावयाची नाहीं.

२७ १ त्या समयीं परमेश्वर आपल्या दुःखकर,
महान् व बलवान् खड्गानें लिव्याथान चपल सर्प
व लिव्याथान वक्र सर्प यांचें पारिपत्य करील;
समुद्रांतील अजगराला ठार मारील.

२ त्या समयीं द्राक्षांच्या रम्य मळ्याविषयीं गीत गा.
३ त्याची निगा ठेवणारा मी परमेश्वर; मी त्यास
घडोघडी पाणी घालितों; त्याला कोणीं उपद्रव करूं
नये म्हणून मी त्याची रात्रंदिवस राखण करितों.

४ माझ्या ठायीं राग कसला तो नाहींच; मजपुढें युद्धांत
कांटे व कांटेरीं असतीं तर तीं मीं पायांखालीं तुडवून
एकंदर जाळून टाकिलीं असतीं; ५ पण त्यानें माझा
आश्रय धरावा, त्यानें मजबरोबर दोस्ती करावी,
मजबरोबर दोस्ती करावी. ६ भावी काळीं याकोब मूळ
धरील; इस्राएल फुलेल व त्याला फळें येतील; ते
फळांनीं भूपृष्ठ भरितील.

७ त्याच्या मारणाऱ्यास मारण्यांत आलें तसें त्यानें
त्याला मारिलें काय ? त्यानें ज्यांना वधिलें त्यांच्या वधा-
प्रमाणें त्यास वधण्यांत आलें काय ? ८ तूं तिचा त्याग
केला तेव्हां तिला तूं बेताचें शासन केलें; पूर्वेकडील
वारा वाहत असतां त्यानें तिला प्रचंड वाऱ्यानें उडवून
दिलें. ९ अशा रीतीनें याकोबाच्या दोषाचें क्षालन होईल;
त्याचें पाप दूर केल्याचें फळ हेंच आहे; तो वेद्यांचे
सर्व चिरे फुटलेल्या चुनखड्यांसारखे करील तेव्हां
अशेरामूर्ति व सूर्यमूर्ति पुनः उभारणार नाहींत.
१० तटबंदीचें शहर उजाड आहे; तें रानासारखें
सोडून दिलेलें व टाकिलेलें वसतिस्थान झालें आहे;
तेथें वासरें चरतात, बसतात व तेथल्या फांद्या खाऊन
टाकितात. ११ त्याच्या डहाळ्या वाळल्या म्हणजे त्या
तोडून टाकितील, स्त्रिया येऊन त्या जाळतील; ते
लोक ज्ञानशून्य आहेत म्हणून त्यांच्या उत्पन्नकर्त्याला
त्यांचा कळवळा येत नाहीं, त्यांचा निर्माणकर्ता त्यांजवर
कृपा करीत नाहीं.

१२ त्या समयीं असें होईल कीं फरात नदाच्या प्रवाहा-
पासून तों मिसरी ओहळापर्यंत परमेश्वर मळणी करील,
आणि इस्राएल लोकांनो, तुम्हांला एकएक असे वेंचतील.
१३ त्या समयीं असें होईल कीं एक मोठा करणा
वाजेल; तेव्हां अश्शूर देशांत गडप झालेले व मिसर
देशांत परागंदा झालेले लोक येतील आणि यरुशलेमां-
तील पवित्र डोंगरावर परमेश्वरास दंडवत घालितील.

२८ १ एफ्राइमांतील मद्यप्यांच्या दिमाखखोर
मुकुटाचा, द्राक्षारसानें झिंगलेल्यांच्या सुपीक
खोऱ्याच्या माथ्यावरील मोठी शोभा देणारें
जें कोमेजणारें फूल त्याचा समूळ नाश होणार. २ पाहा;
प्रभूच्या हातीं मजबूत व समर्थ असा कोणी आहे;
तो गारांच्या वृष्टीसारखा, नासाडी करणाऱ्या वादळा-
सारखा, अतिवृष्टीनें आलेल्या महापुराच्या लपाट्या-
सारखा सर्व बलानें तो मुकुट भूमीवर झुगारून देत
आहे. ३ एफ्राइमांतील मद्यप्यांचा दिमाखखोर मुकुट
पायांखालीं तुडवितील. ४ हंगामापूर्वी आलेला अंजीर
कोणाच्या दृष्टीस पडला म्हणजे तो हातीं लागतांच त्यानें
चटकन खाऊन टाकावा, त्याप्रमाणें सुपीक खोऱ्याच्या
माथ्यावरील मोठी शोभा देणारें जें कोमेजणारें फूल
त्याची गति होईल. ५ त्या दिवशीं सेनाधीश परमेश्वर
आपल्या अवशिष्ट लोकांस वैभवी मुकुट, शोभिवंत
किरीट असा होईल. ६ न्यायासनावर बसणाऱ्यास
न्यायस्फूर्ति, वेशीवर हल्ला करणाऱ्या शत्रूला हटवि-
णाऱ्यांस वीरश्री असा तो होईल.

७ हेहि द्राक्षारसानें भेलकंडत आहेत, मद्यानें झुकांड्या
खात आहेत, याजक व संदेष्टा हे मद्यानें भेलकंडत आहेत,
द्राक्षारसानें गुंग झाले आहेत, मद्यानें झुकांड्या खात आहेत;
ते दृष्टांत पाहतांना भेलकंडतात, निर्णय सांगतांना
झोके खातात. ८ सर्व मेजें वांतीच्या घाणीनें भरलीं
आहेत, निर्मळ जागाच उरली नाहीं.

९ ‘तो कोणाला ज्ञान शिकवितो ? कोणाला संदेश
समजावून सांगतो ? दूध तुटलेल्यांस काय ? थानतुट्या
बालकांस काय ? १० कारण नियमावर नियम; नियमावर
नियम; कानूवर कानू; कानूवर कानू; थोडें येथें, थोडें
तेथें;’ असें तो बोलत असतो.

११ तोतऱ्यांच्या द्वारें परभाषेंत तो या लोकांशीं
बोलेल; १२ तो त्यांस म्हणाला होता, ही
विश्रांति आहे; भागलेल्यास विसावा द्या; यानें त्यास
आराम होईल, तरी ते ऐकतना. १३ ह्यामुळें त्यांस
परमेश्वराचा संदेश अशा प्रकारें प्राप्त होईल: नियमावर
नियम, नियमावर नियम; कानूवर कानू, कानूवर
कानू; थोडें येथें, थोडें तेथें; म्हणजे चालतांना ते
अडखळून मागें पडतील, भंगतील, पाशांत सांपडतील,
पकडले जातील.

१४ यास्तव हेटाळणी करणाऱ्यांनों, यरुशलेमांतील
या लोकांचे अधिपतिहो, परमेश्वराचा संदेश ऐका.
१५ तुम्ही म्हणतां, आम्हीं मृत्यूबरोबर करार केला
आहे, अधोलोकाबरोबर संकेत केला आहे; संकटाचा
लोट येईल तेव्हां तो आम्हांवर येणार नाहीं, कारण आम्हीं
लबाडीचा आश्रय केला आहे व कपटाखालीं दडून राहिलों
आहों. १६ यास्तव प्रभु परमेश्वर म्हणतो : पाहा, सीयोनांत
पायाचा दगड बसविणारा मी आहें; तो पारखलेला
दगड आहे; पायाला योग्य असी मजबूत व मोलवान्
ती कोनशिला आहे; विश्वास ठेवणाऱ्याची त्रेधा उडणार
नाहीं. १७ न्याय ही दोरी व धार्मिकता हा ओळंबा असें
मी करीन; लबाडीचा आश्रय गारांनीं वाहून जाईल,
व दडण्याची जागा जलाचे ओघ बुडवून टाकितील.
१८ मृत्यूबरोबर केलेला तुमचा करार रद्द होईल;
अधोलोकाबरोबर केलेला तुमचा संकेत टिकणार नाहीं;
संकटाचा लोट येईल तेव्हां तुमची पायमल्ली होईल.
१९ जेव्हांजेव्हां तो येईल तेव्हांतेव्हां तो तुम्हांला
ग्रासील; नित्य सकाळीं, रात्रीं व दिवसा तो येईल;
हा संदेश कळल्यानें दहशत पोहंचेल. २० कारण पाय
पसरण्याला खाट फार आखूड आहे; पांघरण्याला
पासोडी फार अरुंद आहे. २१ परमेश्वर आपलें
कार्य, आपलें अपूर्व कार्य करण्यास, आपली कृति,
आपली विलक्षण कृति सिद्धीस नेण्यास पराझीम डोंगरा-
वर उठल्याप्रमाणें उठेल, गिबोन खोऱ्यांतल्याप्रमाणें
क्षुब्ध होईल. २२ आतां हेटाळणी करूं नका, नाहींतर
तुमच्या बिड्या जास्त आवळतील; कारण सर्व भूमीवर
निश्चयानें येणारा जो भयंकर नाश त्याविषयीं प्रभु,
सेनाधीश परमेश्वर, याजकडून मीं ऐकलें आहे.

२३ कान देऊन माझी वाणी ऐका, लक्ष लावून
माझें वचन ऐका. २४ पेरण्यासाठीं नांगरणारा नांगरीत,
तास पाडीत व गुठें घालीत सतत राहतो काय?
२५ जमीन सारखी केल्यावर तींत तो काळें जिरें
टाकितो, जिरें विखरितो, गहूं रांगेनें व जव नेमल्या
जागीं पेरितो व कडेला काठ्या गहूं पेरितो कीं नाहीं?
२६ हें योग्य प्रकारें करण्याचें शिक्षण त्याला मिळालें
आहे; त्याचा देव त्याला शिकवितो. २७ ह्यामुळें तो
काळ्या जिऱ्याची मळणी तीक्ष्ण धारेच्या यंत्रानें करीत
नाहीं व जिऱ्यावर गाडीचें चाक फिरवीत नाहीं, तर काळें
जिरें काठीनें व जिरें दांड्यानें झोडपतो. २८ भाकरीच्या
धान्याचा तो भुगा करितो काय? नाहीं. तो त्याची
मळणी सतत चालवीत नाहीं, तो आपल्या गाडीचें
चाक व घोडे त्यावर सतत घालीत नाहीं, तो त्याचा भुगा
करीत नाहीं. २९ हेंहि सेनाधीश परमेश्वराकडून घडलें,
त्याची बुद्धि आश्चर्यकारक व त्याचें चातुर्य थोर आहे.

२९ १ अरीएले यास धिक्कार असो! दाविदानें तळ
दिलेलें अरीएल नगर यास धिक्कार असो! या
वर्षांत आणखी एक वर्ष मिळवा, सणांचा एक
फेरा होऊं द्या. २ मग मी अरीएलावर संकट आणीन;
शोक व कण्हणें चालू होईल. तरी पण तें नगर मला
अरीएलत्र असें होईल. ३ मीं तुझ्याभोंवतीं वेढा घालीन
व तुझी नाकेबंदी करून तुजवर मोर्चे रचीन. ४ तुला
खालीं पाडितील तेव्हां तूं भूमींतून बोलशील; धुळींतून
तुझा शब्द हळूच निघेल; जमिनींतून भूतासारखा तुझा
ध्वनि उठेल; धुळींतून कुजबुजल्यासारखी तुझी वाणी निघेल.
५ तरी तुझ्या शत्रूंचा समुदाय रजःकणांसारखा
होईल, तुला पीडणाऱ्यांचा समुदाय उडणाऱ्या भुसा-
सारखा होईल; हें एका क्षणांत, एकाएकीं घडेल.
६ मेघगर्जना, भूमिकंप, महानाद, वावटळ, तुफान व
ग्रासणारी अग्निज्वाला यांनीं सेनाधीश परमेश्वर तुझा
समाचार घेईल. ७ अरीएलावर उठलेल्या सर्व राष्ट्रांचा
समुदाय, अरीएल व त्याचा दुर्ग यांवर हल्ला करून त्याला
पीडा देणारे सगळे स्वप्नासारखे, रात्रीच्या आभासासारखे
होतील. ८ कोणी क्षुधित स्वप्नांत जेवतो आणि जागा
होऊन पाहतो तों पोट रितेंच; कोणी तृषित स्वप्नांत
पितो आणि जागा होऊन पाहतो तों व्याकुळ व
तृषाक्रांत; तशीच सीयोन पर्वताविरुद्ध उठलेल्या सर्व
राष्ट्रसमूहाची स्थिति होईल.

९ थांबा, विस्मय पावा, आपले डोळे मिटा, अंध
व्हा; ते मस्त झाले आहेत पण द्राक्षारसानें नव्हत; ते

१ म्हणजे देवाचा सिंह किंवा देवाचें अग्निकुंड.

झोकांडे खात आहेत पण मद्यानें नव्हत. १० परमेश्वरानें गाढ झोपेची धुंदी तुम्हांवर घातली आहे, तुमचे नेत्र बांधून टाकिले आहेत, संदेष्टे व तुमचे प्रमुख जे द्रष्टे त्यांजवर पडदा टाकिला आहे. ११ सगळा दृष्टांत तुम्हांस मोहरबंद केलेल्या लेखांतील शब्दांसारखा झाला आहे; तो लेख वाचणाऱ्याकडे देऊन म्हणतात, एवढें वाचून दाखीव; तो म्हणतो, हा मला वाचतां येत नाहीं, कारण हा मोहरबंद केलेला आहे. १२ ज्याला वाचतां येत नाहीं अशाजवळ तो देऊन म्हणतात, एवढें वाचून दाखीव; तो म्हणतो, मला वाचतां येत नाहीं.

१३ प्रभु म्हणाला आहे कीं हे लोक माझ्यासमीप येऊन आपल्या तोंडच्या शब्दांनीं माझा सन्मान करितात, तरी मजपासून आपलें अंतःकरण दूर राखितात; आणि हें माझें भय बाळगितात तें केवळ मनुष्यांनीं पढविलेल्या आज्ञेप्रमाणें बाळगितात. १४ तर पाहा, मी या लोकांशीं अद्भुत प्रकारें वर्तण्यास प्रवृत्त होतों; मी अद्भुत व आश्चर्यावह कृत्य करीन, तेव्हां त्यांच्यांतील ज्ञान्यांचें ज्ञान नष्ट होईल, त्यांच्यांतील बुद्धिमानांची बुद्धि लुप्त होईल.

१५ जे परमेश्वरापासून आपले मनसुबे लपवितात, आपला कारभार अंधारांत चालवितात आणि आम्हांला कोण पाहतो, आमचें कोणाला कळतें, असें म्हणतात; त्यांस धिक्कार असो. १६ धिक्कार असो तुमच्या उलट्या समजाला! माती कुंभाराशीं समान असें गणतील काय? तूं मला केलें नाहीं असें कर्त्याला कर्म म्हणेल काय? तुला अक्कल नाहीं असें घडलेली वस्तु घडणाऱ्यास म्हणेल काय?

१७ लबानोनाचा बाग होण्यास, बागाचें वन गणिलें जाण्यास थोडासा अवधि आहे, नाहीं काय? १८ त्या दिवशीं लेखांतील शब्द बहिरे ऐकतील व अंधळ्यांचे डोळे काळोख व अंधार यांपासून मुक्त होऊन पाहतील. १९ नम्र जनांचा परमेश्वराच्या ठायींचा आनंद वृद्धि पावेल; लोकांतील दीन जन इस्राएलाच्या पवित्र प्रभूच्या ठायीं उल्लास पावतील. २० कारण जुलमी नाहींतसे झाले आहेत; हेटाळणी करणारे आटपले आहेत, वाइटाला जागणारे सर्व समूळ उच्छेद पावले आहेत. २१ ते नुसत्या शब्दावरून मनुष्याला दोषी ठरवितात, वेशीवरील स्पष्टवक्त्यासाठीं जाळें पसरितात व धार्मिकास धडधडीत लबाडीनें उलथून पाडितात;

२२ म्हणून अब्राहामाचा उद्धारकर्ता परमेश्वर याकोबाच्या घराण्याविषयीं म्हणतो, यापुढें याकोब लज्जायमान होणार नाहीं व त्याचा चेहरा फिका पडणार नाहीं. २३ कारण त्याचे वंशज आपल्यामध्यें माझ्या हातून झालेलें काम पाहतील तेव्हां ते माझें नाम पवित्र मानितील; याकोबाच्या पवित्र प्रभूस पवित्र मानितील व इस्राएलाच्या देवाचें भय बाळगितील. २४ भ्रांतबुद्धि जन सुज्ञान पावतील व कुरकुर करणारे शिक्षण घेतील.

# ३०

१ परमेश्वर म्हणतो, फितुरी मुलें हायहाय करितील; ती मसलती करितात पण त्या माझ्या प्रेरणेनें करीत नाहींत; तीं करारमदार करितात पण माझ्या आत्म्यास अनुसरून करीत नाहींत; अशीं तीं पापानें पाप वाढवितात; २ तीं फारोचा आश्रय करण्यासाठीं व मिसराच्या छायेंत लपण्यासाठीं माझ्या तोंडचें वचन न विचारून घेतां मिसराची वाट धरितात; ३ म्हणून फारोचा आश्रय तुम्हांस लज्जेस कारण होईल, व मिसराच्या छायेंत लपणें तुम्हांस फजितीस कारण होईल. ४ त्याचे (यहूदाचे) सरदार सोअनास दाखल झाले आहेत व त्याचे वकील हानेसाला पोहंचले आहेत. ५ तरी त्या लोकांबद्दल त्या सर्वांस लज्जा प्राप्त होईल, त्यांपासून त्यांस कांहीं लाभ व्हावयाचा नाहीं, त्यांपासून त्यांस साहाय्य व उपयोग न होतां लज्जा व अप्रतिष्ठा ह्या प्राप्त होतील.

६ दक्षिणेंतल्या पशूंविषयींची देववाणी:

ज्यांत सिंहीण व सिंह, सर्प व उडता आग्या साप हीं असतात अशा कष्टमय व संकटमय देशांत ज्यान गाढवांच्या पाठीवर आपली दौलत व उंटांच्या मदारींवर आपले खजिने लादून ज्यापासून कांहीं लाभ होणार नाहीं अशा राष्ट्राकडे ते घेऊन जातात. ७ मिसराचें साहाय्य

कवडीमोल व व्यर्थ ठरेल, म्हणून या मिसरास राहाब
म्हणजे स्वस्थ बसणारें महासुख असें नांव मी देतों.
८ तर आतां चल, त्यांच्यासमक्ष हें पाटीवर लिही,
वहींत टिपून ठेव म्हणजे तें पुढील पिढ्यांसाठीं युगा-
नुयुग राहील. ९ कारण हे बंडखोर लोक आहेत, हीं
लबाड मुलें आहेत; परमेश्वराचें धर्मशास्त्र ऐकावयास
नको अशीं हीं मुलें आहेत; १० ते द्रष्ट्यांस म्हणतात,
दृष्टांत पाहूं नका; संदेष्ट्यांस म्हणतात, आम्हांस यथार्थ
गोष्टींचा संदेश सांगूं नका, आम्हांस गोडगोड गोष्टी
सांगा, कपटवचनें सांगा; ११ मार्गांतून निघा, वाटे-
वरून दूर व्हा, आमच्यासमोरून इस्राएलाच्या पवित्र
प्रभूस दूर करा. १२ यामुळें इस्राएलाचा पवित्र प्रभु
म्हणतो, तुम्ही ह्या वचनाचा धिक्कार करून बलात्कार व
कुटिलाचार यांवर भिस्त ठेवितां व अवलंबून राहतां;
१३ म्हणून एकाएकीं कोसळून पडणाऱ्या उंच भिंतीच्या
सुटलेल्या भागाप्रमाणें ह्या अधर्माचें तुम्हांस अकस्मात्
फळ मिळेल, १४ कुंभाराच्या मडक्याचा सपाट्यासरसा
चुराडा होतो आणि पडलेल्या तुकड्यांत आगटींतून
विस्तव घेण्यास किंवा हौदांतून पाणी घेण्यास खापरीहि
सांपडत नाहीं, तसा तो त्याचा चुराडा करील.

१५ कारण प्रभु परमेश्वर, इस्राएलाचा पवित्र प्रभु म्हणाला,
मागें फिरणें व स्वस्थ राहणें यांत तुमचा बचाव आहे;
शांतता व श्रद्धा यांत तुमचें सामर्थ्य आहे; तरी तसें
तुम्ही करीतना. १६ तुम्ही म्हणालां, नाहीं, आम्ही
घोड्यांवर बसून पळूं, म्हणून तुम्हांस पळावें लागेल;
तुम्ही म्हणालां, आम्ही चपळ घोड्यांवर बसूं, म्हणून
तुमचा पाठलाग करणारे चपळ बनतील. १७ एकाच्या
धमकीनें तुमचे हजार पळतील, पांचांच्या धमकीनें तुम्ही
पळाल; डोंगरमाथ्यावरील एकाद्या ध्वजस्तंभासारखे,
टेकडीवरील ध्वजेसारखे तुम्हीच तेवढे शेष उराल.

१८ ह्यामुळें परमेश्वर तुम्हांवर प्रसन्न होण्यास
विलंब लावील, तुम्हांवर करुणा करावी म्हणून
उच्चस्थानीं आरूढ होईल; परमेश्वर न्यायी देव आहे,
जे त्याची वाट पाहतात ते सर्व धन्य.

१९ सीयोनांत, यरुशलेमांत, लोकांची वस्ती
राहील; तूं इत:पर कधीं शोक करणार नाहीस; तुझ्या
धाव्याच्या शब्दाबरोबर तो तुजवर कृपा करीलच; तो
ऐकतांच तो तुला पावेल. २० प्रभु तुम्हांस भाकरीची
टंचाई व पाण्याची कमताई करील, तरी यापुढें तुझे
शिक्षक दृष्टीआड राहणार नाहींत; तुझ्या डोळ्यांना
तुझे शिक्षक दिसतील. २१ हाच मार्ग आहे, यानें
चला, अशी वाणी तुमच्यामागून कानीं पडेल; मग
तुम्हांला उजवीकडे जावयाचें असो किंवा डावीकडे
जावयाचें असो. २२ तुमच्या रुपेरी कोरींव मूर्तींची
मढवणी व तुमच्या सोनेरी ओतींव मूर्तींचा मुलामा
तुम्ही अपवित्र लेखाल, एकाद्या अमंगळ वस्तूप्रमाणें त्या
तुम्ही झोकून द्याल; चालती हो, असें तुम्ही मूर्तींस म्हणाल.

२३ तूं भूमींत आपलें बीं पेरिशील त्यावर तो
पाऊस पाडील, भूमि पीक देईल तें अन्न रसभरित
व सत्वपूर्ण असेल; त्या काळीं तुझीं गुरेंढोरें विस्तीर्ण
कुरणांत चरतील. २४ शेतांत राबणारे बैल व ज्वान
गाढव यांस दांताळ्यानें उफणलेल्या व सुपानें पाखड-
लेल्या धान्याचें आंबवण खावयास मिळेल. २५ मोठ्या
कत्तलीच्या दिवशीं बुरूज पडतील तेव्हां प्रत्येक उंच
डोंगरावर व प्रत्येक उंच टेंकडीवर झरे व ओहोळ होतील.
२६ ज्या दिवशीं परमेश्वर आपल्या लोकांचे घाय
बांधील, त्यांच्या प्रहाराच्या जखमा बऱ्या करील, त्या
दिवशीं चंद्रप्रकाश सूर्यप्रकाशासारखा आणि सूर्यप्रकाश
सात दिवसांच्या प्रकाशाएवढा सातपट होईल.

२७ पाहा, परमेश्वराचें नाम दुरून येत आहे,
त्याचा क्रोध भडकला आहे, धुराचा लोट चढत आहे;
त्याचे ओठ क्रोधानें स्फुरत आहेत, त्याची जिव्हा भस्म
करणाऱ्या अग्नीसारखी आहे; २८ त्याचा श्वास दुथडी
भरून वाहणाऱ्या व गळ्यापर्यंत पोहंचणाऱ्या प्रवाहा-
सारखा आहे, तो राष्ट्रांस नाशरूप चाळणीनें चाळितो;
भ्रांतिमूलक लगाम लोकांच्या जाभाडांत आला आहे.
२९ सण पाळितांना जसा रात्रीं गायनाचा नाद उठतो
तसा तुमच्या गायनाचा नाद उठेल; परमेश्वराच्या
पर्वताकडे, इस्राएलाच्या दुर्गाकडे बासरी वाजवीत
समारंभानें जाणाऱ्यांच्याप्रमाणें तुमच्या मनास उल्लास

मस्त होईल. ३० तेव्हां परमेश्वर आपला प्रतापी
शब्द कानीं पाडील, आणि आपल्या क्रोधाचें
फुरफुरणें, भस्म करणाऱ्या अग्नीची ज्वाळा, मेघांचा
गडगडाट आणि पर्जन्य व गारा यांची वृष्टि यांनीं
आपलें भुजबल दाखवील. ३१ कारण परमेश्वर
आपल्या दंडानें ताडण करील तेव्हां त्याच्या वाणीनें
अश्शूर भयकंपित होईल; ३२ आणि असें होईल कीं
डफांचा व वीणांचा नाद होत असतां परमेश्वर त्यांज-
वर नेमिलेल्या दंडाचा प्रत्येक प्रहार करील व हात
खालीं-वर करून त्यांशीं युद्ध करील. ३३ कारण पूर्वींच
दहनस्थान[1] तयार केलें आहे; तें राजासाठीं सिद्ध केलें
आहे; तें खोल व रुंद केलें आहे; त्याच्या चितेसाठीं
विस्तव व भरपूर लाकडें आहेत; गंधकाच्या धारेसारखा
परमेश्वराचा फुंकर ती पेटवितो.

३१ १ जे साहाय्यार्थ खालीं मिसर देशांत
जातात व घोड्यांवर भिस्त ठेवितात, आणि रथ
बहुत आहेत व घोडेस्वार फार बळकट
आहेत म्हणून त्यांवर भरवसा ठेवितात, पण इस्रा-
एलाच्या पवित्र प्रभूकडे लक्ष देत नाहींत, परमेश्वराचा
आश्रय करीत नाहींत, ते हायहाय करितील. २ तरी
तोहि सुज्ञ आहे, तो अरिष्ट आणील, आपलीं वचनें
टळूं देणार नाहीं; तर तो दुष्कर्म्यांच्या घराण्यावर व
अधर्म करणारे त्यांच्या कुमकेवर उठेल. ३ मिसरी तर
मानव आहेत, देव नाहींत; त्यांचे घोडे रक्तमांसाचे
आहेत, आत्मरूप नाहींत; परमेश्वर आपला हात
उगारील तेव्हां साहाय्यकर्ता ठोकर खाईल व साहाय्य
पावलेलाहि पडेल; ते सर्व एकंदर विनाश पावतील.
४ परमेश्वर मला म्हणाला, जसा सिंह, तरुण सिंह,
आपल्या भक्ष्यावर गुरगुरत असतां, मेंढरांची टोळी
बोलावून त्यावर घातली तरी त्यांच्या आरोळीनें तो
घाबरावयाचा नाहीं व त्यांच्या गोंगाटानें दबावयाचा
नाहीं, तसा सेनाधीश परमेश्वर सीयोन डोंगरावर
त्याच्या टेकडीवर लढावयास उतरेल. ५ पक्षी जसे
पाखर घालितात तसा सेनाधीश परमेश्वर यरुशलेमाचें
रक्षण करील, तो त्याचा बचाव करून त्याला सोडवील,
त्याला ओलांडून (सलामत राखून) मुक्त करील.
६ इस्राएल वंशजांनो, ज्याच्याशीं तुम्हीं फितुरी
केली आहे त्याजकडे वळा. ७ त्या समयीं तुम्हीं
आपल्या हातांनीं रुप्याच्या व सोन्याच्या मूर्ति करून
पापांत पडलां; त्यांचा ते सगळे त्याग करितील.
८ अश्शूर तरवारीनें पडेल पण मनुष्याच्या नव्हे;
मनुष्याची नव्हे अशी तरवार त्यास ग्रासील; तो तरवारी-
पुढून पळेल; त्याच्या तरुण पुरुषांस वेठीस धरितील.
९ त्याचा दुर्ग भयानें पळून जाईल, व त्याचे सरदार झेंडा
पाहून घाबरतील; ज्याचा अग्नि सीयोनांत आहे व
ज्याची भट्टी यरुशलेमांत आहे, तो परमेश्वर असें म्हणतो.

३२ १ पाहा, राजा धर्मानें राज्य करील, त्याचे
सरदार न्यायानें सत्ता चालवितील. २ वाऱ्या-
पासून आसरा व वादळापासून निवारा असा एक
मनुष्य होईल; रुक्ष भूमींत पाण्याचे नाले, तप्त भूमींत
विशाळ खडकाची छाया असा तो होईल. ३ तेव्हां
पाहणाऱ्यांचे डोळे मंद होणार नाहींत; ऐकणाऱ्यांचे
कान ऐकतील. ४ उतावळ्यांच्या मनाला ज्ञानाचा
उमज पडेल, तोतऱ्यांची जीभ अस्खलित स्पष्ट बोलेल.
५ मूर्खाला थोर व ठकास प्रतिष्ठित म्हणणार नाहींत.
६ भ्रष्टाचार करावा, परमेश्वराविरुद्ध पाखंड सांगावें,
भुकेला जीव भुकेला ठेवावा, तान्हेल्यास पिण्यास कांहीं
मिळूं देऊं नये म्हणून मूर्ख मूर्खतेचें भाषण करितो,
त्याचें मन अधर्म करितें. ७ ठकाचीं साधनेंहि दुष्टतेचीं
असतात; दीन आपल्या वाजवी हक्काचें समर्थन करीत
असतां ठक खोट्या शब्दांनीं दुर्बलांचा नाश करण्याच्या
दुष्ट युक्ति योजितो; ८ पण थोर पुरुष थोर गोष्टी
योजितो व थोर गोष्टींला धरून राहतो.

९ अहो सुखांत राहणाऱ्या स्त्रियांनो, उठा, माझी वाणी
ऐका; अहो निश्चिंत कन्यांनो, माझ्या बोलण्याकडे कान

[1] मुळांतः तोफेत (२ राजे २३:१० आणि यिर्मया ७:३१ पाहा).

या. १० अहो निश्चिंत स्त्रियांनो, एका वर्षाहून कांहीं
दिवस अधिक तुम्ही बेचैन व्हाल; कारण द्राक्षांचा
हंगाम बुडेल, फळें हातीं लागणार नाहींत. ११ सुखांत
राहणाऱ्या स्त्रियांनो, थरथर कांपा; निश्चिंत असणा-
ऱ्यांनो, घाबऱ्या व्हा, वस्त्रें फेडा, उघड्या व्हा, कंबरेस
गोणताट गुंडाळा. १२ रम्य शेतें व फलयुक्त द्राक्षांचे वेल
नाहींत म्हणून त्या ऊर बडवितील. १३ माझ्या लोकांच्या
भूमीवर कांटेकुसळें उगवतील; या उल्लासी नगराच्या
सर्व आनंदमय घरांवरहि तीं उगवतील; १४ कारण
राजभुवन ओस होईल, गजबजलेलें शहर सुनें पडेल;
टेकडी व टेहळणीचा बुरूज हीं सदासर्वदा गुहा बनतील,
तेथें रानगाढवांचें क्रीडास्थान व कळपांची चरण होईल.
१५ आम्हांवर आत्म्याची वृष्टि वरून होईल तोंवर असें
होईल; मग अरण्य बाग होईल, व बागेस वन गणितील.
१६ तेव्हां अरण्यांत न्याय्यत्व वास करील व
बागेत नीतिमत्ता वसेल. १७ नीतिमत्तेचा परिणाम
शांति व तिचें फल सर्वकाळचें स्वास्थ्य व निर्भयता
होईल; १८ आणि माझे लोक शांत स्थळीं, निर्भय
वसतिस्थानांत व सुखाश्रमांत राहतील; १९ पण
वनाचा नाश होतेवेळीं गारा पडतील व शहर निखालस
जमीनदोस्त करण्यांत येईल. २० जे तुम्ही सर्व
ठिकाणच्या पाण्यालगत पेरणी करितां आणि बैलांना व
गाढवांना मोकळेपणें फिरूं देतां ते तुम्ही धन्य.

३३ १ अरे लुटाऱ्या, तुला लुटलें नाहीं; अरे
ठका, तुला ठकविलें नाहीं; तुला धिक्कार असो!
तुझें लुटणें आटपलें म्हणजे तुला लुटितील; तुझें
ठकविणें आटपलें म्हणजे तुला ठकवितील. २ हे परमे-
श्वरा, आम्हांवर कृपा कर; आम्ही तुझी आशा धरून
आहों; रोज सकाळीं तूं त्यांचा भुज हो, आणि संकट-
समयीं आमचा उद्धारक हो. ३ कल्होळाचा ध्वनि
ऐकतांच लोक पळून गेले; तूं उभा राहतांच राष्ट्रें पांगून
गेलीं. ४ टोळ जसें फस्त करितात तशी तुमची लूट
हरण करितील, नाकतोडे धाड घालतात तसे तिजवर
धाड घालितील. ५ परमेश्वर उन्नत आहे, उच्च
स्थानीं राहून त्यानें सीयोन न्यायशीलतेनें व धार्मिकतेनें
भरिलें आहे. ६ तुझ्या काळीं स्थिरता वसेल; तारण,
सुज्ञता व ज्ञान यांचें वैपुल्य होईल; परमेश्वराचें भय
त्याचा निधि होईल.
७ पाहा, त्यांचे वीर बाहेर रडत आहेत; शांतीचा
संदेश आणणारे स्फुंदून स्फुंदून रडत आहेत.
८ राजमार्ग ओस पडले आहेत, कोणी प्रवासी
आढळत नाहींत; त्यानें करार मोडिला, नगरांचा
उपमर्द केला, मनुष्यांचा धिक्कार केला. ९ देश विलाप
करितो; तो म्लान झाला आहे; लबानोन निस्तेज व
शुष्क झाला आहे; शारोन अरण्यप्राय झाला आहे;
बाशान व कर्मेल आपलीं पानें गाळीत आहेत.
१० परमेश्वर म्हणतो, आतां मी उठेन; मी उभा राहीन;
आतां मी आपली महती दाखवीन. ११ तुम्ही भुसाचा
गर्भ धराल व धसकट प्रसवाल; तुमचा श्वास हाच अग्नि
आहे, तो तुम्हांस ग्रासील. १२ राष्ट्रें भाजलेल्या चुन-
खडीसारखीं भस्म होतील; कांटेरीं तोडून आगींत जाळि-
तात तशीं तीं होतील.
१३ दूरच्या लोकांनो, मीं काय केलें तें ऐका; जवळ-
च्या लोकांनो, माझें सामर्थ्य ओळखा. १४ सीयोनांतील
पातकी घाबरले आहेत; अधर्म्यांस कांपरें भरलें आहे.
भस्म करणाऱ्या अग्नीसमीप आमच्यांतला कोण
राहील? सर्वकाळ पेटत राहणाऱ्या अग्नीसमीप
आमच्यांतला, कोण टिकेल? १५ जो धर्मानें चालतो,
सरळ भाषण करितो, जुलूम करून होणारा लाभ
अव्हेरितो, लाच घेण्यापासून आपला हात आवरितो,
घातपाताच्या मनसुब्याला आपले कान बंद करितो,
दुष्कर्मांकडे पाहूं नये म्हणून आपले डोळे मिटतो, १६ तो उच्च स्थानीं
वास करील, दुर्गम पहाड त्याचा दुर्ग होईल, त्याला
अन्नाचा मुबलक पुरवठा होईल, त्याचें जल आटणार नाहीं;
१७ तुझे नेत्र राजाला वैभवसंपन्न असा पाहतील.
ते दूरदूर विस्तृत पसरलेली भूमि पाहतील. १८ त्या भय-
प्रसंगाचें तूं आपल्या मनांत चिंतन करिशील; कोठें गेला
तो गणना करणारा? कोठें गेला तो तोलणारा? कोठें आहे
तो बुरुजांची गणना करणारा? १९ आडदांड लोक, अस्पष्ट

दुर्बोध बोलणारे बाबर ओठांचे लोक, ज्यांची बोली तुला
समजत नाहीं अशा तोतऱ्या जिभेचे लोक यापुढें
तुझ्या नजरेस पडणार नाहींत. २० आमचे मेळे
भरविण्याचें सीयोन नगर पाहा; यरुशलेम सुखधाम
आहे असें तुझ्या दृष्टीस पडेल; जो कधीं हालवीत
नाहींत, ज्याच्या मेखा कधीं उपटीत नाहींत, ज्याची
एकहि दोरी तोडीत नाहींत, अशा तंबूसारखें तें
तुझ्या दृष्टीस पडेल. २१ आणखी तेथें आम्हांसाठीं
प्रतापी परमेश्वराचा निवास होईल; तें रुंद नदीनाल्यांचें
ठिकाण होईल; त्यांत वल्ह्यांच्या तारवाचा, मोठ्या
जहाजाचा प्रवेश होणार नाहीं. २२ कारण परमेश्वर
आमचा न्यायाधीश आहे, परमेश्वर आमचा नियंता
आहे, परमेश्वर आमचा राजा आहे; तो आम्हांस
तारील. २३ तुझे दोर ढिले पडले आहेत; ते डोल-
काठीचा आधार स्थिर राखीत नाहींत; ते शीड
पसरीत नाहींत; ते विपुल लूट वांटितात; लंगडेहि
लूट करितात. २४ मी रोगी आहें असें एकहि
रहिवासी म्हणणार नाहीं; तेथें राहणारे पातकाची
क्षमा पावतात.

३४ १ अहो राष्ट्रांनो, ऐकावयाला जवळ या;
लोकांनो, कान द्या; पृथ्वी व तीवरील सर्व
कांहीं, जग व त्यांत उपजलेलें सर्व कांहीं
ऐकोत. २ कारण परमेश्वराचा कोप सर्व राष्ट्रांवर होत
आहे, त्याचा संताप त्यांच्या सर्व सैन्यांवर होत आहे;
त्यानें त्यांचा सर्वस्वीं नाश केला आहे; त्यानें त्यांचा
वध करावयास लाविलें आहे. ३ त्यांच्यांतले वधलेले
बाहेर टाकून देतील, त्यांच्या प्रेतांची दुर्गंधि सुटेल व
त्यांच्या रक्तानें पर्वत विरघळतील. ४ आकाशांतील सर्व
सेना गळून पडेल, आकाश गुंडाळीप्रमाणें गुंडाळलें जाईल;
द्राक्षवेलीचें पान सुकून पडतें, अंजिराचा सुकलेला
गाला गळतो, त्याप्रमाणें ती सेना समूळ गळून पडेल.
५ कारण माझ्या तरवारीस आकाशांत उन्माद चढला
आहे; पाहा, शासन करण्यासाठीं अदोमावर, ज्या लोकांचा
सर्वस्वीं नाश करण्याचें मीं योजिलें आहे त्यांच्यावर ती
उतरेल. ६ परमेश्वराची तरवार रक्तानें भरली आहे.
मांसानें, कोकरांच्या व बकऱ्यांच्या रक्तानें, एडक्यांच्या
गुर्दांच्या मांसानें पुष्ट झाली आहे; कारण परमेश्वर
बस्रांत यज्ञ, अदोमाच्या देशांत महावध करणार आहे.
७ रेडे, बैल व गोऱ्हे हे सर्व त्यांच्याबरोबर पडतील;
त्यांच्या रक्तानें त्यांची भूमि मस्त होईल; तेथली
माती मांसानें भरून जाईल.

८ सीयोनाला न्याय मिळावा म्हणून सूड घेण्याचा
हा परमेश्वराचा दिवस, प्रतिफळ देण्याचें हें
वर्ष होय. ९ त्याचे ओढे राळ बनतील, त्याची
धूळ गंधक होईल, व त्याचा देश राळेसारखा
जळेल. १० तो रात्रंदिवस विझणार नाहीं; त्याचा धूर
सदा चढत राहील; पिढ्यानपिढ्या तो ओसाड पडेल;
कधींहि त्यांत कोणी संचार करणार नाहीं. ११ पाण-
कोळी व साळू हीं त्याचीं मालक होतील; घुबडें
व डोमकावळे हीं तेथें वस्ती करितील; आणि परमेश्वर
अव्यवस्थेचें सूत्र व शून्यतेचा ओळंबा त्यावर लावील,
१२ त्याच्या सरदारांस राजपदासाठीं बोलावितील पण
कोणी सांपडावयाचा नाहीं; त्याचे सर्व अधिपति
नाहींतसे होतील. १३ त्याच्या राजवाड्यांत कांटेरी
उगवतील व त्याच्या किल्ल्यांत खाजकुईली व कांटेझाडें
उगवतील; तो कोल्ह्यांचें वसतिस्थान व शहामृगांचें
अंगण होईल. १४ तेथें वनपशु कोल्ह्यांस भेटतील,
बोकडरूपी पिशाच आपल्या सोबत्यास हाक मारील;
निशाचरहि तेथें राहून आराम पावेल. १५ तेथें सर्पीण
आपल्यासाठीं बीळ करील, अंडीं घालून उबवील व
तेथील छायेंत पिलांचें संगोपन करील; तेथें गिधाडें
जोडप्याजोडप्यांनीं जमा होतील.

१६ परमेश्वराच्या ग्रंथांत शोधा, वाचा; या प्राण्यां-
पैकीं एकहि कमी असणार नाहीं, कोणी जोडप्यावांचून
असणार नाहीं; कारण माझ्याच मुखानें हें आज्ञापिलें आहे,
त्याच्या श्वासानें त्यांस एकवट केलें आहे. १७ त्यानें त्यां-
साठीं चिठ्ठी टाकिली आहे, त्यानें आपल्या हातानें मापन-
सूत्र लावून देश त्यांस वांटून दिला आहे; ते त्याचे सर्व-
काळचे वतनदार होतील, ते पिढ्यानपिढ्या त्यांत राहतील.

## ३५

१ अरण्य व रुक्ष भूमि हीं हर्षतील; वाळवंट
उल्लासेल व कमलाप्रमाणें फुलेल. २ तें अत्यंत
प्रफुल्लित होईल, आनंदानें गाऊन उत्सव करील;
लबानोनाची शोभा त्याला मिळेल; कर्मेल व शारोन
यांचें ऐश्वर्य त्याला प्राप्त होईल; तीं परमेश्वराचें वैभव,
आमच्या देवाचें ऐश्वर्य, पाहतील.
३ गलित हस्त दृढ करा; लटपटणारे गुडघे बळकट
करा. ४ घाबऱ्या मनाच्यांस म्हणा, हिय्या धरा, भिऊं
नका; पाहा, तुमचा देव सूड घ्यावयास, अनुरूप असें
प्रतिफल द्यावयास येईल; तो येईल व तुमचा उद्धार करील.
५ तेव्हां अंधांचे नेत्र उघडतील, बहिऱ्यांचे
कान खुले होतील. ६ तेव्हां लंगडा हरिणाप्रमाणें
उड्या मारील, मुक्याची जीभ गजर करील; कारण
रानांत जलप्रवाह, वाळवंटांत झरे फुटतील. ७ जेथें मृग-
जल दिसतें तेथें तलाव होईल; तृषित भूमीचे ठिकाणीं उप-
ळते झरे होतील; कोल्हे राहतात त्या स्थळीं बोरू व लव्हाळे
यांसहित गवत उगवेल. ८ तेथील मार्ग राजमार्ग
होईल; त्याला पवित्र मार्ग म्हणतील; त्यानें अपवित्र जन
जाणार नाहींत; पण तो त्यांच्यासाठींच, परमेश्वराच्या
लोकांसाठीं होईल; त्या मार्गानें जाणारे मूढ असले
तरी मार्ग चुकणार नाहींत. ९ तेथें सिंह असणार
नाहींत, हिंस्र पशूंचा तेथें रिघाव होणार नाहीं, तेथें ते
आढळणार नाहींत; पण तेथें उद्धरलेले संचार करितील.
१० परमेश्वराचे मुक्त केलेले लोक परत येतील; ते
जयजयकार करीत सीयोनांत येतील; त्यांच्या मस्तकीं
अक्षय आनंद राहील; ते आनंद व हर्ष पावतील,
दुःख व उसासे पळ काढितील.

## ३६

१ हिज्कीया राजाच्या कारकीर्दीच्या चौदाव्या
वर्षी असें झालें कीं अश्शूरचा राजा सन्हेरीब
यानें यहूदाच्या सर्व तटबंदी नगरांवर चढाई
करून तीं घेतलीं. २ तेव्हां अश्शूरच्या राजानें
लाखीशाहून रब-शाके[1] यास मोठ्या सैन्यानिशीं हिज्कीया
राजाकडे यरुशलेमास पाठविलें. तो परटाच्या शेता-
जवळील रस्त्यावरील वरच्या तळ्याच्या नळाजवळ येऊन
ठेपला. ३ त्याजकडे खानगी कारभारी एल्याकीम
बिन हिल्कीया, चिटणीस शेबना व बखरनवीस
आसाफाचा पुत्र यवाह हे गेले.
४ तेव्हां रब-शाके त्यांस म्हणाला, हिज्कीयाला सांगा
कीं राजाधिराज अश्शूरचा राजा म्हणतो, हा तुझा भरवसा
कसला? ५ मी म्हणतों, तुझा युद्धसंकल्प व तुझें युद्धबळ
हीं केवळ वायफळ होत; तूं माझ्याशीं फितूर झालास
तो कोणाच्या बळावर? ६ पाहा, तो मिसर म्हणजे
चेंचलेला बोरू, त्यावर तूं टेकतोस; त्यावर कोणी टेकला
तर तो त्याच्या हातांत शिरून बोंचेल; जे कोणी
मिसरी राजा फारो याजवर टेकतात ते तसेच होतात.
७ त्या सर्वांस जर तूं असें म्हणशील कीं आम्ही आमचा
देव परमेश्वर याजवर भिस्त ठेवितों, तर ज्या देवाचीं
उच्चस्थानें व वेद्या काढून टाकून यहूदा व यरुशलेम यांस
हिज्कीया म्हणाला होता कीं या एका वेदीपुढें भजन
करा, तोच नव्हे का तो देव? ८ आतां माझा धनी
अश्शूरचा राजा याच्याशीं पैज लाव; तुला स्वार बस-
विण्याची ताकद असली तर तुला दोन हजार घोडा
देतों. ९ माझ्या धन्याचा कनिष्ठ दर्जाचा एक तरी
सरदार कसा पिटाळून लाविशील? आणि तूं रथ व
स्वार मिळविण्याविषयीं मिसरावर भिस्त ठेवतोसना?
१० मी या देशावर चढाई करून त्याचा विध्वंस करण्यास
आलों तो का परमेश्वराच्या सांगण्यावांचून? परमेश्वरानेंच
मला सांगितलें आहे कीं या देशावर चढाई करून
जा व याचा विध्वंस कर.
११ मग एल्याकीम, शेबना व यवाह यांनीं रब-शाके
यांस विनंति केली कीं आपल्या ह्या दासांशीं अरामी भाषेंत
बोला, ती आम्हांस समजते; कोटावरील लोकांच्या कानीं
पडेल म्हणून यहूदी भाषेंत आम्हांशीं बोलूं नका. १२
रब-शाके यानें उत्तर केलें कीं माझ्या धन्यानें केवळ तुझ्या
धन्याशीं व तुजशीं हें बोलण्यास मला पाठविलें काय?
कोटावर बसलेल्यांनीं तुम्हांबरोबर आपलें मलमूत्र भक्षण
करावें म्हणून त्यांजकडेहि मला पाठविलें नाहीं काय?

१ हें एक हुद्द्याचें नांव आहे.

१३ मग रब-शाके पुढें होऊन यहूदी भाषेंत मोठ्यानें
म्हणाला, ऐका हो, राजाधिराज अश्शूरचा राजा यांचें
भाषण ऐका. १४ राजा म्हणतो, हिज्कीयास तुम्हांला
भुरळ घालूं देऊं नका; त्याच्यानें तुमचा बचाव व्हाव-
याचा नाहीं; १५ परमेश्वर आमचा बचाव करीलच
करील, हें शहर अश्शूरच्या राजाच्या हातीं जाणार
नाहीं, असें बोलून हिज्कीया तुम्हांस परमेश्वरावर
भिस्त ठेवावयास न लावो. १६ हिज्कीयाचें ऐकूं
नका, कारण अश्शूरचा राजा म्हणतो: मजशीं सख्य
करा व मजकडे निघून या, आणि तूर्त तुम्ही प्रत्येक जण
आपआपल्या द्राक्षीचें फळ खा, तुम्ही प्रत्येक
जण आपआपल्या अंजिराचें फळ खा व तुम्ही प्रत्येक
जण आपआपल्या हौदाचें पाणी प्या; १७ पुढें मी
येऊन तुमच्या देशासारखा देश, धान्याचा व द्राक्षांचा
देश, अन्नाचा व द्राक्षींच्या मळ्यांचा देश यांत तुम्हांस
नेईन. १८ परमेश्वर आमचा बचाव करील असें बोलून
हिज्कीया तुमचें मन न फिरवो. राष्ट्रांच्या देवांपैकीं
कोणीं आपला देश अश्शूरच्या राजाच्या हातून सोड-
विला आहे काय? १९ हमाथ व अर्पाद यांचे देव कोठें
आहेत? सफरवाईमचे देव कोठें आहेत? त्यांनीं
शोमरोन माझ्या हातून सोडविलें आहे काय? २० या
सर्व देशांच्या देवांपैकीं कोणीं आपला देश माझ्या हातून
सोडविला आहे? तर परमेश्वर माझ्या हातून यरुशलेम
कसें सोडविणार?

२१ ह्यावर ते गप्प राहिले, त्याजशीं एकहि शब्द
बोलले नाहींत; कारण तुम्हीं त्याला उत्तर देऊं नये,
अशी राजाची त्यांस ताकीद होती. २२ मग
खानगी कारभारी एल्याकीम बिन हिज्कीया, चिटणीस
शेबना व बखरनवीस यवाह बिन आसाफ हे आपलीं
वस्त्रें फाडून हिज्कीयाकडे आले व त्यांनीं त्याला रब-
शाके याचें बोलणें कळविलें.

## ३७

१ हें ऐकून हिज्कीया राजा आपलीं वस्त्रें
फाडून व गोणताट नेसून परमेश्वराच्या
मंदिरांत गेला. २ तेव्हां खानगी कारभारी
एल्याकीम, चिटणीस शेबना व याजकांपैकीं वडील
यांना गोणताट नेसलेले असे आमोजाचा पुत्र यशया
संदेष्टा याच्याकडे त्यानें पाठविलें. ३ ते त्याला म्हणाले,
हिज्कीया असें म्हणतो कीं आजचा दिवस क्लेश,
शिक्षा, व अपमान यांचा आहे, कारण मुलें जन्मा-
वयास आलीं पण प्रसवण्याची शक्ति नाहीं. ४ तुझा
देव परमेश्वर कदाचित् रब-शाके याचे शब्द ऐकेल;
त्याला त्याचा धनी अश्शूरचा राजा यानें जीवंत देवाचा
उपमर्द करण्यास पाठविलें आहे; आणि ते त्याचे शब्द
ऐकून तुझा देव परमेश्वर त्यांचा निषेध करील;
म्हणून जें कांहीं शेष उरलें आहे त्यांच्याकरितां तूं
रदबदली कर.

५ ह्याप्रमाणें हिज्कीया राजाचे सेवक यशया याजकडे
आले. ६ तेव्हां यशया त्यांस म्हणाला, आपल्या धन्याला
असें सांगा: परमेश्वर म्हणतो, अश्शुरी राजाच्या सेवकांनीं
ज्या शब्दांनीं माझा उपमर्द केला आहे ते शब्द तूं ऐकले
आहेत, त्यांमुळें तूं घाबरूं नको. ७ पाहा, मी त्याच्या
ठायीं अशी कांहीं प्रेरणा करीन कीं तो कसली तरी
अफवा ऐकून आपल्या देशास परत जाईल, व
आपल्याच देशांत तो तरवारीनें पडेल, असें मी करीन.

८ नंतर रब-शाके परत गेला तेव्हां अश्शुराचा राजा
लिब्ना नगराबरोबर लढतांना त्याला आढळला; कारण
लाखीशाहून राजानें तळ उठविला अशी त्याला खबर
लागली होती. ९ मग कुशाचा राजा तिऱ्हाका आपणाशीं
लढावयास निघाला आहे असें कोणीं बोलतांना त्यानें ऐकलें.
हें ऐकून त्यानें हिज्कीयाला जासुदांच्या हातीं सांगून
पाठविलें कीं, १० तुम्ही यहूदाचा राजा हिज्कीया याजकडे
जाऊन सांगा, ज्या तुझ्या देवावर तूं भिस्त ठेवितोस
तो, यरुशलेम अश्शुरी राजाच्या हातीं लागणार नाहीं,
असें बोलून तुला न फसवो. ११ अश्शुरी राजांनीं
सर्व देशांचें काय केलें तें पाहा! त्यांचा विध्वंस कसा
केला हें तूं ऐकलें आहेच; तर तूं सुटणार काय?
१२ गोजान, हारान, रेसफ व तलस्सार येथें राहणारे
एदेनी लोक यांचा माझ्या वाडवडिलांनीं विध्वंस केला;
त्यांचा त्या राष्ट्रांच्या देवांनीं बचाव केला काय?
१३ हमाथाचा राजा, अर्पादाचा राजा, सफरवाईम
शहर, हेना व इव्वा यांचा राजा हे कोठें आहेत?

१४ हिज्कीयानें जासुदांच्या हातून तें पत्र घेऊन
वाचिलें; मग हिज्कीयानें परमेश्वराच्या मंदिरांत जाऊन तें
परमेश्वरापुढें उघडून ठेविलें. १५ मग हिज्कीयानें परमे-
श्वराची अशी प्रार्थना केली: १६ सेनाधीश परमेश्वरा,
इस्राएलाच्या देवा, करुबारूढ असलेल्या देवा, तूंच
काय तो पृथ्वीवरील सर्व राज्यांचा देव आहेस.
तूंच आकाश व पृथ्वी निर्माण केली. १७ हे परमेश्वरा,
कान लावून ऐक; हे परमेश्वरा, तूं डोळे उघडून पाहा;
आणि तुझा, सदाजीवी देवाचा उपमर्द करण्यासाठीं
सन्हेरिबानें निरोप पाठविला आहे, त्याचे सर्व शब्द ऐक.
१८ हे परमेश्वरा, खरोखर अश्शूरच्या राजांनीं सर्व देश
व त्यांतली जमीन ओसाड केली आहे; १९ त्यांचे देव
त्यांनीं अग्नींत टाकिले आहेत; कारण ते देव नव्हते,
ते मनुष्यांच्या हातांनीं घडलेले काष्ठपाषाण होते;
म्हणून त्यांनीं त्यांचा नाश केला. २० आतां परमेश्वरा,
आमच्या देवा, त्याच्या हातांतून आम्हांला सोडीव,
म्हणजे पृथ्वीवरील सर्व राज्यें जाणतील कीं तूंच
कायतो परमेश्वर आहेस

२१ तेव्हां आमोजाचा पुत्र यशया यानें हिज्कीयाला
सांगून पाठविलें कीं परमेश्वर इस्राएलाचा देव असें
म्हणतो: अश्शुरी राजा सन्हेरीब याच्यासंबंधानें
तूं माझी प्रार्थना केली; २२ तर त्याच्याविषयीं
परमेश्वर वचन बोलला आहे कीं सीयोनाची कुमारी तुला
तुच्छ लेखिते व तुझा उपहास करिते; यरुशलेमाची
कन्या तूं पाठमोरा झालेला पाहून आपलें मस्तक
हालविते. २३ तूं कोणाची निंदा केली ? कोणाच्या
विरुद्ध दुर्भाषण केलें ? कोणाच्या विरुद्ध ताठ्यानें
बोललास ? कोणावर आपल्या भोवया चढ-
विल्या ? इस्राएलाचा जो पवित्र प्रभु त्याजवर ? २४ तूं
आपल्या सेवकांच्या द्वारें प्रभूची निंदा करून म्हणा-
लास, मी आपल्या बहुत रथांनिशीं पर्वतांच्या
माथ्यांवर, लबानोनाच्या अगदीं मध्यापर्यंत चढून
आलों आहें; मी त्याचे उंच गंधसरू व निवडक देवदारू
तोडून टाकीन; त्याच्या अत्यंत दूरच्या उच्चस्थानीं
त्याच्या फळझाडांच्या राईंत प्रवेश करीन. २५ मी
जमीन खणून पाणी प्यालों; माझ्या पायांच्या तळव्यांनीं
मिसर देशाचे सर्व जलप्रवाह मी सुकवून टाकीन.

२६ तूं ऐकलें ना ? मीं हें पूर्वकाळीं केलें, प्राचीन
काळीं योजिलें असून आतां असें घडवून आणिलें कीं
तुझ्या हातून तटबंदीच्या नगरांचा विध्वंस व नासधूस
व्हावी; २७ म्हणून त्यांतील रहिवासी बलहीन झाले,
ते भयभीत व फजीत झाले; शेतांतील हिरवळ, हिरवें
गवत, धाब्यांवरचें गवत, कोवळें शेत यांसारखे ते
झाले. २८ तुझें बसणेंउठणें, तुझें जाणेंयेणें व
तुझा मजवरला संताप मला ठाऊक आहे. २९ मज-
वरल्या तुझ्या संतापामुळें व तुझा उन्मत्तपणा माझ्या
कानांवर आल्यामुळें मी तुझ्या नाकांत माझी वेसण
व तुझ्या तोंडांत माझा लगाम घालून ज्या वाटेनें तूं
आलास तिनेंच तुला परत लावीन.

३० आतां तुला हें चिन्ह देतों: यंदा तुम्ही आपोआप
उगवलेलें खाल, पुढल्या वर्षी त्याला खोडवा फुटेल तो
खाल; तिसऱ्या वर्षी तुम्ही पेरा, कापा, द्राक्षांचे मळे लावा
व त्यांचें फळ खा. ३१ यहूदाच्या घराण्यांतील निभाव-
लेला अवशेष पुनः खालीं मूळ धरील व वर फळ देईल.
३२ कारण यरुशलेमांतून अवशेष निघेल व सीयोन
डोंगरांतून निभावलेले निघतील; सेनाधीश परमेश्वराचा
आवेश हें सिद्धीस नेईल.

३३ म्हणून अश्शुराच्या राजाविषयीं परमेश्वर म्हणतो,
तो या नगरापर्यंत येणार नाहीं; यावर एकहि बाण सोडणार
नाहीं; तो ढाल घेऊन याशीं सामना करणार नाहीं आणि
यावर मोर्चा रचणार नाहीं. ३४ ज्या वाटेनें तो आला
तिनेंच तो परत जाईल; तो या नगरापर्यंत येणार नाहीं;
असें परमेश्वर म्हणतो. ३५ आपल्याकरितां व माझा
सेवक दावीद याच्याकरितां या नगराचा बचाव होईल
असें मी याचें रक्षण करीन.

३६ मग परमेश्वराच्या दिव्यदूतानें जाऊन अश्शुरी
गोटांतल्या एक लक्ष पंचायशीं हजार लोकांस मारिलें;
पहाटेस लोक उठून पाहतात तों सर्व प्रेतेंच प्रेतें!
३७ ह्याप्रमाणें अश्शुराचा राजा सन्हेरीब तळ उठवून
माघारीं चालता झाला आणि निनवेंत जाऊन राहिला.

३८ तेव्हां असें झालें कीं तो आपलें दैवत निस्रोख
याच्या देवळांत पूजा करीत असतां त्याचे पुत्र अद्रम्मे-
लेक व शरेसर यांनीं त्यास तरवारीनें वधिलें व ते
अरारात देशीं पळून गेले. मग त्याच्या जागीं त्याचा
पुत्र एसर-हद्दोन राजा झाला.

# ३८

१ त्या समयीं हिज्कीया आजारी पडून
मरावयास टेकला. तेव्हां आमोजाचा पुत्र यशया
संदेष्टा त्याजकडे येऊन त्याला म्हणाला, परमेश्वर
म्हणतो, आपल्या घराण्याची निरवानिरव कर, कारण
आतां तूं मरणार, जगणार नाहींस. २ तेव्हां हिज्कीयानें
आपलें तोंड भिंतीकडे फिरवून परमेश्वराची प्रार्थना
केली. ३ तो म्हणाला, हे परमेश्वरा, मी तुझ्यासमोर
सत्यतेनें व सात्विक मनानें वागलों आहें व तुझ्या
दृष्टीनें जें योग्य तेंच करीत आलों आहें हें स्मर, अशी
मी तुला विनंति करितों. असें म्हणून हिज्कीया मनस्वी
रडला. ४ तेव्हां यशयाला परमेश्वराचा संदेश आला
तो हा: ५ हिज्कीयास जाऊन सांग कीं तुझा पूर्वज
दावीद याचा देव परमेश्वर म्हणतो, मीं तुझी प्रार्थना
ऐकली आहे, तुझे अश्रु पाहिले आहेत; पाहा,
मी तुझें आयुष्य आणखी पंधरा वर्षें वाढवितों. ६ मी
तुला व ह्या नगराला अश्शूरच्या राजाच्या हातांतून
सोडवीन, ह्या नगराचें संरक्षण करीन. ७ परमेश्वर
बोलला आहे, तें करीलच, याविषयीं परमेश्वराकडून
तुला हें चिन्ह आहे: ८ पाहा, आहाजाच्या शंकुयंत्राच्या
पायऱ्यांवर सूर्याबरोबर छाया दहा पायऱ्या उतरली
आहे, तिला परत दहा पायऱ्या वर आणितों. तेव्हां
सूर्याबरोबर छाया दहा पायऱ्या उतरली होती ती
दहा पायऱ्या मागें सरली.

९ यहूदाचा राजा हिज्कीया दुखण्यानें पडला होता
तो त्यांतून वांचल्यावर त्यानें लेख लिहिला तो हा:

१० मीं म्हटलें, माझ्या आयुष्याच्या सुखावस्थेंत[1]
मी अधोलोकाच्या द्वारांत प्रवेश करीन;
माझ्या आयुष्याचीं अवशिष्ट वर्षें
मजपासून हिरावून घेतलीं आहेत.

११ मीं म्हटलें, मला परमेशाचें, जीवंतांच्या भूमीवर
असतां,
परमेशाचें दर्शन होणार नाहीं;
मी जगांतील रहिवाश्यांसह राहून मनुष्य माझ्या
दृष्टीस इतःपर पडणार नाहीं.[1]

१२ माझें घर मोडिलें आहे, तें धनगराच्या राहुटी-
सारखें उखळून नेण्यांत आलें आहे;
कोष्ट्याप्रमाणें मीं आपलें जीवित आटोपलें आहे;
तो मागाच्या ताण्यांतून मला तोडणार आहे;
दिवस जाऊन रात्र येईल तों तूं
माझा अंत करिशील.

१३ सकाळपर्यंत मी आपलें मन शांत करीत राहिलों;
तो सिंहाप्रमाणें माझीं सर्व हाडें मोडणार;
दिवस जाऊन रात्र येईल तों तूं
माझा अंत करिशील.

१४ निळवीप्रमाणें, सारसाप्रमाणें मी चिवचिवलों;
पारव्याप्रमाणें मी घुमलों; वर पाहून पाहून माझे
डोळे शिणले.
हे परमेश्वरा, मजवर गहजब झाला आहे,
मला जामीन हो.

१५ आतां मी काय सांगूं?
त्यानें मला वचन दिलें व त्याप्रमाणें केलेंहि;
माझ्या जिवाच्या पीडेस्तव माझीं सर्व वर्षें मी
संथपणें क्रमीन.

१६ हे प्रभू, अशा गोष्टींच्या योगें
लोक जीव धरून राहतात;
त्यांतच सर्वस्वीं माझ्या आत्म्याचें जीवित आहे;
म्हणून तूंच मला बरें कर व जीवंत ठेव.

१७ पाहा, माझ्या बऱ्यासाठींच ही पीडा मला झाली;
तूं माझा जीव नाशगर्तेतून मायेनें उद्धरिला;
कारण तूं माझीं सर्व पापें आपल्या पाठीकडे
टाकिलीं आहेत.

१८ अधोलोक तुझा धन्यवाद करीत नाहीं,
मृत्यु तुझी स्तुति गात नाहीं;

---

१ अथवा: ऐन मध्यान्हीस.

१ अथवा: मी मृतांच्या लोकीं असतां मनुष्य माझ्या

शवगर्तेत उतरलेले तुझ्या सत्याची अपेक्षा
करीत नाहीत.
१९ जीवंत, जीवंत माणूसच तुझा धन्यवाद करितो,
तसा मी आज करीत आहें;
बाप तुझें सत्य मुलांस प्रकट करितो.
२० परमेश्वर मला तारण्यास सिद्ध आहे;
म्हणून आम्ही आपलीं तंतुवाद्यें वाजवूं;
तीं सर्व आयुष्यभर परमेश्वराच्या मंदिरांत वाजवूं.
२१ यशयानें सांगितलें होतें कीं अंजिरांची एक चांदकी
आणून गळवावर बांधा म्हणजे त्याला गुण पडेल.
२२ हिज्कीयानें म्हटलें होतें, मी परमेश्वराच्या मंदिरांत
वर जाईन याचें चिन्ह काय?

## ३९

१ त्या वेळीं बलदानाचा पुत्र मरोदख-
बलदान,[1] जो बाबेलचा राजा, त्यानें
हिज्कीयाला पत्रें व नजराणा हीं पाठविलीं;
कारण तो आजारी पडल्यानंतर बरा झाला असें त्यानें
ऐकलें होतें. २ तेव्हां त्यांजवर हिज्कीयानें खुश
होऊन त्यांस आपलें अमोल भांडार दाखविलें; आपलें
सोनेंरुपें, सुगंधी द्रव्यें, उत्तम तेल, सगळा शस्त्रागार,
सारांश, आपल्या भांडागारांत होतें तें सगळें
त्यानें त्यांस दाखविलें; त्याच्या घरांत व सगळ्या
राज्यांत त्यांना दाखवावयाचें कांहींएक राहिलें नाहीं.
३ मग यशया संदेष्ट्यानें हिज्कीया राजाकडे येऊन
विचारिलें, हीं मनुष्यें काय म्हणालीं, व आपल्याकडे कोठून
आलीं? हिज्कीयानें उत्तर केलें, तीं दूर देशाहून, बाबेला-
हून मजकडे आलीं होतीं. ४ मग त्यानें विचारिलें,
त्यांनीं आपल्या घरांत कायकाय पाहिलें? हिज्कीयानें
म्हटलें, माझ्या घरांतलें सर्व कांहीं त्यांनीं पाहिलें; त्यांला
माझ्या भांडागारांतलें दाखविलें नाहीं असें कांहींच
नाहीं. ५ तेव्हां यशया हिज्कीयाला म्हणाला,
सेनाधीश परमेश्वराचें वचन ऐक: ६ पाहा, असे
दिवस येत आहेत कीं तुझ्या घरांत जें कांहीं आहे व
तुझ्या वाडवडिलांनीं जें आजवर सांठवून ठेविलें आहे,
तें सर्व बाबेलास नेण्यांत येईल, कांहीं शिल्लक राहणार
नाहीं, असें परमेश्वर म्हणतो. ७ जे पुत्र तुला होतील,
तुझ्या पोटीं निर्माण होतील, त्यांपैकीं कोणांस घेऊन जाण्यांत
येईल ते बाबेलच्या राजवाड्यांत खोजे होऊन राहतील.
८ तेव्हां हिज्कीया यशयाला म्हणाला, तूं सांगितलेलें
परमेश्वराचें वचन यथायोग्य आहे. तो आणखी म्हणाला,
माझ्या काळीं तरी शांतता व स्थिरता राहील.

## ४०

१ सांत्वन करा, माझ्या लोकांचें सांत्वन
करा, असें तुमचा देव म्हणतो. २ यरुशलेमा-
च्या मनाला धीर येईल असें बोला, त्याला
पुकारून सांगा, तुझें युद्ध संपलें आहे, तुझ्या पापा-
बद्दलचा दंड मिळाला आहे; परमेश्वराच्या हातून तुझ्या
सर्व पापांचा तुला दुप्पट बदला मिळाला आहे.
३ घोषणा करणाऱ्याची वाणी ऐकूं येते कीं अरण्यांत
परमेश्वराचा मार्ग सिद्ध करा, आमच्या देवासाठीं रानांत
सरळ राजमार्ग करा. ४ प्रत्येक खोरें उंच होवो, प्रत्येक
डोंगर व टेकडी सखल होवो; उंचनीच असेल तें सपाट
होवो व खडकाळीचें मैदान होवो; ५ म्हणजे परमेश्वराचें
गौरव प्रगट होईल आणि सर्व मानवजाति एकत्र मिळून
तें पाहील, कारण हें बोलणें परमेश्वराच्या तोंडचें आहे.
६ घोषणा कर, अशी वाणी ऐकूं आली. तेव्हां
कोणीएक म्हणाला, काय घोषणा करूं? सर्व मानव-
जाति गवत आहे, तिची सर्व शोभा वनांतल्या फुलासारखी
आहे; ७ गवत सुकतें, फूल कोमेजतें; कारण परमे-
श्वराचा फुंकर त्यावर पडतो; लोक खरोखर गवतच
आहेत. ८ गवत सुकतें; फूल कोमेजतें, पण आमच्या
देवाचें वचन सर्वकाळ कायम राहतें.
९ सीयोनास सुवार्ता सांगणाऱ्ये,[1] उंच डोंगरावर
चढ; यरुशलेमास सुवार्ता सांगणाऱ्ये,[2] आपला स्वर
जोरानें उंच कर, कर उंच, भिऊं नको; यहूदाच्या
नगरांस म्हण, तुमचा देव पाहा. १० पाहा, प्रभु पर-
मेश्वर पराक्रम्यासारखा येत आहे; त्याचा भुज त्याचें

१ **अथवा:** बरोदख-बलदान ( २ राजे २०:१२ पाहा. )

१ **अथवा:** सुवार्तिके सीयोने, उंच
२ **अथवा:** सुवार्तिके यरुशलेमे, आपला

प्रभुत्व चालवील; पाहा, वेतन त्याजजवळ आहे, व प्रतिफळ त्याच्या हातीं आहे. ११ मेंढपाळाप्रमाणें तो आपल्या कळपास चारील, कोकरें आपल्या कवेंत घेऊन उराशीं धरून वाहील, आणि पोरें पाजणाऱ्यांस संभाळून नेईल.

१२ जलांचें माप आपल्या चुळक्यानें कोणीं केलें आहे? आकाशाचें माप आपल्या वितीनें कोणीं घेतलें आहे? पृथ्वीची धूळ मापानें कोणीं मापिली आहे? डोंगर कांट्यानें व टेकड्या तराजूनें कोणीं तोलिल्या आहेत? १३ परमेश्वराच्या आत्म्याचें नियमन कोणीं केलें आहे? त्याचा मंत्री होऊन त्याला कोणीं शिकविलें आहे? १४ त्यानें कोणाला मसलत विचारिली? सन्मार्गाविषयीं समज देऊन त्याला कोणीं शिक्षण दिलें? त्याला कोणीं ज्ञान शिकविलें? सुज्ञतेचा मार्ग त्याला कोणीं दाखविला? १५ पाहा, त्याच्या हिशोबीं राष्ट्रें पोहऱ्यांतल्या जलबिंदूसमान, तराजूंतल्या रजासमान आहेत; पाहा, द्वीपेंहि तो धुळीच्या कणांसारखीं उचलितो. १६ लबानोन जळणास पुरावयाचा नाहीं व त्यावरील वनपशु होमास पुरे पडावयाचे नाहींत. १७ सर्व राष्ट्रें त्याजपुढें कांहींच नाहींत; त्याच्या हिशोबीं तीं अभाव व शून्यता यांहूनहि कमी आहेत.

१८ तुम्ही देवाला कोणाची उपमा द्याल? त्याच्याशीं कोणती प्रतिमा लावून पाहाल? १९ कारागीर मूर्ति ओतून तयार करितो, सोनार तिला सोन्याच्या पत्र्यानें मढवितो, तिच्यासाठीं चांदीच्या सांखळ्या घडितो. २० जो दारिद्र्यामुळें अर्पण आणण्यास समर्थ नाहीं तो न कुजणारें लाकूड निवडून घेतो; न ढळणारी अशी मूर्ति बनविण्यासाठीं तो चतुर कारागीर शोधून काढितो. २१ तुम्हांस कळत नाहीं काय? तुम्हांस ऐकूं येत नाहीं काय? प्रारंभापासून तुम्हांला हें कळविलें नाहीं काय? पृथ्वीचा पाया घातल्यापासून हें तुम्हांस समजलें नाहीं काय? २२ हाच तो पृथ्वीच्या वरील नभोमंडळावर आरूढ झाला आहे; तिच्यावरील रहिवासी टोळांसमान आहेत; तो आकाश मलमलीप्रमाणें पसरितो, राहण्यासाठीं तंबू ताणितात तसें तें तो ताणितो. २३ तो अधिपतींना अभावग्रस्त पाठवितो, पृथ्वीच्या न्यायाधीशांना शून्यवत करितो. २४ त्यांना लाविलें न लाविलें, पेरिलें न पेरिलें, त्यांचें मूळ भूमींत रुजलें न रुजलें, तोंच तो त्यांवर फुंकर मात्र घालितो म्हणजे ते सुकून जातात; वादळ त्यांस भुसाप्रमाणें उडवून नेतें. २५ मी कोणाशीं तुल्य आहें म्हणून त्यांची उपमा मला तुम्ही द्याल असें पवित्र प्रभु म्हणतो. २६ आपले डोळे वर करून पाहा; ह्यांना कोणीं उत्पन्न केलें? तो त्यांच्या सैन्याची मोजणी करून त्यांस बाहेर आणितो; तो त्या सर्वांस नांवांनीं हाका मारितो, तो महासमर्थ व प्रबळ सत्ताधीश आहे; म्हणून त्यांपैकीं कोणी उणा पडत नाहीं.

२७ हे याकोबा, असें कां म्हणतोस, हे इस्राएला, असें कां बोलतोस कीं माझा मार्ग परमेश्वरापासून गुप्त आहे व माझा न्याय देवाच्या दृष्टीआड झाला आहे? २८ तुला कळलें नाहीं काय? तूं ऐकलें नाहीं काय? परमेश्वर हा सनातन देव, परमेश्वर, दिगंत पृथ्वीचा उत्पन्नकर्ता, थकत भागत नाहीं; त्याची बुद्धि अगम्य आहे. २९ तो भागलेल्यास जोर देतो, निर्बलास विपुल बल देतो. ३० तरुण थकतात, भागतात; भरज्वानींतले ठेचा खातात; ३१ तरी परमेश्वराची आशा धरून राहणारे नवीन शक्ति संपादन करितील; ते गरुडांप्रमाणें पंखांनीं वर उडतील; ते धावतील तरी दमणार नाहींत, चालतील तरी थकणार नाहींत.

४१ १ अहो द्वीपांनो, मजपुढें गप्प राहा; राष्ट्रें नवीन शक्ति संपादन करोत; तीं जवळ येवोत मग बोलोत; निवाडा करण्यास आपण एकत्र जमूं. २ ज्याच्या पावलांस धार्मिकता अनुसरते, अशाची उठावणी उगवतीकडून कोणीं केली? राष्ट्रें त्याला वश होतील असें तो करितो; राजांवर त्याची सत्ता बसवितो, तो त्यांस धुळीसारखे त्याच्या तरवारीच्या स्वाधीन करितो, व उडणाऱ्या धसकटाप्रमाणें त्यांस त्याच्या धनुष्याच्या स्वाधीन करितो. ३ तो त्यांचा पाठलाग करितो, ज्या वाटेंत त्यानें कधीं पाऊल ठेविलें नव्हतें

तिनें तो बिनधोक जातो. ४ हें कार्य कोणीं केलें? तें शेवटास कोणीं नेलें? जो प्रारंभापासून एकामागून एक पिढ्या जन्मास आणितो त्यानेंच. तो मी परमेश्वर आदि आहें व अंतीं असणाऱ्यांसहहि तो मीच आहें. ५ द्वीपें पाहून भ्यालीं; पृथ्वीच्या सीमा हादरल्या; तीं जवळ येऊन मिळालीं. ६ त्यांतील प्रत्येकानें आपआपल्या सोबत्याला साहाय्य केलें; प्रत्येक आपल्या बंधूस म्हणाला, हिंमत धर. ७ ओतार्‍यानें सोनाराला, हातोड्यानें गुळगुळीत करणार्‍यानें ऐरणीवर घण मारणार्‍याला, धीर दिला आणि सांधा चांगला बसला असें म्हटलें व मूर्ति ढळूं नये म्हणून त्यानें ती खिळ्यांनीं मजबूत बसविली.

८ माझ्या सेवका, इस्राएला, माझ्या निवडलेल्या याकोबा, माझा मित्र अब्राहाम याच्या संताना, ९ मीं तुला हातीं धरून पृथ्वीच्या दिगंतांपासून आणिलें, तिच्या सीमांपासून बोलावून तुला म्हटलें, तूं माझा सेवक आहेस, मीं तुला निवडिलें आहे, तुझा त्याग केला नाहीं. १० तूं भिऊं नको, कारण मी तुझ्याबरोबर आहें; घाबरूं नको, कारण मी तुझा देव आहें; मी तुला शक्ति देतों; मी तुझें साहाय्यहि करितों; मी आपल्या धार्मिकतेच्या उजव्या हातानें तुला सावरितों. ११ पाहा, जे तुजवर क्षुब्ध झाले ते लज्जित व फजीत होतील; तुजशीं झुंजणारे शून्यवत् व नष्ट होतील. १२ तुजशीं लढणाऱ्यांस तूं धुंडाळिशील पण ते तुला सांपडावयाचे नाहींत; तुजशीं युद्ध करणाऱ्यांचा नायनाट होईल. १३ कारण मी परमेश्वर तुझा देव तुझा उजवा हात धरून म्हणत आहें कीं, भिऊं नको, मी तुझें साहाय्य करितों. १४ हे कीटका, याकोबा, इस्राएलाचे लोकहो, भिऊं नका, असें परमेश्वर म्हणतो; मी तुझें साहाय्य करितों; इस्राएलाचा पवित्र प्रभु तुझा उद्धारकर्ता आहे. १५ पाहा, मी तुझें तीक्ष्ण, नवीन व दुधारी असें मळणीचें आऊत बनवीत आहें; तूं डोंगर मळून त्यांचा चुराडा करिशील व टेकड्यांचा भुसा करिशील. १६ तूं त्यांस उफणशील, वारा त्यांस उडवून टाकील, वावटळ त्यांस उधळून देईल; आणि तूं परमेश्वराच्या ठायीं उल्लास पावशील, इस्राएलाच्या पवित्र प्रभूचा अभिमान धरिशील.

१७ दीन व दरिद्री पाणी शोधितात पण तें कोठेंच नाहीं; त्यांची जीभ तहानेनें कोरडी पडली आहे; त्यांची विनंति मी परमेश्वर ऐकेन, मी इस्राएलाचा देव त्यांचा त्याग करणार नाहीं. १८ मी उजाड टेकड्यांवर नद्या व खोल दऱ्यांतून झरे वाहवीन; मी अरण्य पाण्याचें तळें व निर्जल प्रदेश जलप्रवाह करीन. १९ अरण्यांत मी गंधसरू, बाभूळ, मेंदी व कण्हेर यांची लावणी करीन व रानांत सरू, देवदारू, व भद्रदारू एकत्र लावीन. २० येणेंकरून लोक तत्काळ पाहतील, जाणतील, मनन करितील व समजतील कीं, परमेश्वराच्या हातून हें झालें आहे; इस्राएलाच्या पवित्र प्रभूनें हें उत्पन्न केलें आहे.

२१ परमेश्वर म्हणतो, आपला वाद पुढें आणा; याकोबाचा राजा म्हणतो, तुम्ही आपले बळकट पुरावे आणा. २२ ते आणा व पुढें काय घडणार तें आम्हांस कळवा; प्रथम घडणाऱ्या गोष्टी कोणत्या तें सांगा, म्हणजे त्यांचा आम्ही विचार करूं व त्यांचा अखेर परिणाम काय तो पाहूं; अथवा पुढें होणाऱ्या गोष्टी आम्हांस ऐकवा. २३ पुढें काय होईल तें कळवा म्हणजे तुम्ही देव आहां असें आम्ही समजूं; तुम्ही बरेंवाईट कांहीं तरी करा, म्हणजे आम्ही तत्काळ चकित होऊन पाहूं.[1] २४ पाहा, तुम्ही कांहींच नाहीं, तुमच्या हातून कांहींएक होणें नाहीं; तुमची निवड करणारा साक्षात् अमंगळ होय.

२५ मीं उत्तरेकडून एकाची उठावणी केली आहे; तो आला आहे; जो माझें नाम घेतो त्याची मी सूर्याच्या उगवतीकडून उठावणी केली आहे; चिखल तुडवितात किंवा कुंभार मातीचा गारा तुडवितो तसा तो अधिपतींस तुडवील. २६ आम्हांस समजावें म्हणून हें प्रारंभापासून कोणीं प्रगट केलें? तो न्यायी आहे असें आम्हीं म्हणावें म्हणून पूर्वकालापासून कोणीं सांगितलें? हें कोणींच कळविलें नाहीं; कोणीं हें ऐकविलें नाहीं, कोणीं तुमचे शब्द ऐकले नाहींत.

---

१ अथवा: आम्ही एकमेकांविषयीं स्पर्धायुक्त होऊन त्यांकडे पाहूं.

२७ मीच प्रथम सीयोनास म्हणालों, हें पाहा, मीं
यरुशलेमासाठीं सुवार्तिक नेमिला आहे. २८ मी पाहतों
तों कोणी दिसेना; मी विचारितों तों त्यांच्यामध्यें उत्तर
देईल असा एकहि मंत्री नाहीं. २९ पाहा, ते सर्व
व्यर्थ आहेत, त्यांचीं कृत्यें निरर्थक आहेत; त्यांच्या
ओतींव मूर्ति वायफळ व शून्यवत् आहेत.

४२ १ पाहा, हा माझा सेवक, याला मी आधार
आहें; पाहा, हा माझा निवडलेला, याजविषयीं
माझा जीव संतुष्ट आहे; याच्याठायीं मी आपला
आत्मा घातला आहे; तो राष्ट्रांस न्याय प्राप्त करून
देईल. २ तो गवगवा करणार नाहीं, तो आपला स्वर
उंच करणार नाहीं, तो रस्त्यांतून पुकारा करणार नाहीं.
३ चेपलेला बोरू तो मोडणार नाहीं, मिणमिणती वात
तो विझविणार नाहीं; तो सत्यानें न्यायाची प्रवृत्ति
करील. ४ पृथ्वीवर न्याय स्थापीपर्यंत तो मंदावणार नाहीं व
भंगणार नाहीं; द्वीपें त्याच्या धर्मशास्त्राची प्रतीक्षा करितात.

५ आकाश निर्माण करून विस्तारणारा,
पृथ्वीचा व तिच्या उपजाचा फैलाव करणारा,
तिच्यावरील लोकांस प्राण घालणारा व तिच्यावर
संचार करणाऱ्यांस जीवित देणारा देव परमेश्वर असें
म्हणतो; ६ मीं परमेश्वरानें न्यायानुसार तुला बोलाविलें
आहे, मीं तुझा हात धरिला आहे, तुला राखिलें आहे; तूं
लोकांला करार व राष्ट्रांला प्रकाश देणारा असें मी तुला
करीन; ७ अंधळ्यांचे डोळे उघडावे, बंदिशाळेंतून
बंदिवानांस व अंधारांत बसलेल्यांस कारागृहांतून
बाहेर काढावें म्हणून मी असें करीन. ८ मी परमेश्वर
आहें; हें माझें नाम आहे; मी आपलें गौरव दुसऱ्यास
देऊं देणार नाहीं; मी आपली प्रशंसा मूर्तींस प्राप्त होऊं
देणार नाहीं. ९ पहिल्या गोष्टी घडून चुकल्या आहेत;
नव्या गोष्टी मी विदित करितों; त्यास आरंभ होण्यापूर्वी
त्या तुम्हांस ऐकवितों.

१० अहो समुद्रावर पर्यटन करणारे व त्यांत राह-
णारे सर्व लोकहो, अहो द्वीपांनो, तुम्ही आपल्या रहि-
वाश्यांसह परमेश्वराला नवगीत गा, पृथ्वीच्या दिगंतापर्यंत
त्याचीं स्तोत्रें गा. ११ अरण्य व त्यांतील नगरें, आणि
ज्या खेड्यापाड्यांत केदार वसत आहे तीं, गाण्याचा गजर
करोत; सेलाचे रहिवासी उत्सव करोत, ते टेकड्यांच्या
माथ्यांवर मोठ्यानें जयघोष करोत. १२ ते परमेश्वराचें
गौरव करोत, द्वीपद्वीपांतरीं त्याचा गुणानुवाद करोत.
१३ परमेश्वर वीराप्रमाणें निघेल; रणधुरंधराप्रमाणें
तो आपल्या आवेशाचें उद्दीपन करील; तो प्रचंड
शब्द करील; तो रणशब्द करील; तो स्वशत्रूंस
आपला प्रभाव दाखवील.

१४ मीं दीर्घकाळ मौन धरिलें; मी स्तब्ध राहिलों; मीं
स्वतांला आवरिलें; वेणा देणाऱ्या स्त्रीप्रमाणें मी आतां कुंथत
आहें, उसासे व धापा टाकीत आहें. १५ मी पर्वत व
टेकड्या उद्ध्वस्त करीन, त्यांवरचा झाडपाला सुकवीन;
नद्यांचीं बेटें करीन, तळीं आटवून टाकीन.
१६ माहीत नाहीं अशा रस्त्यानें मी अंधळ्यांस
नेईन; अज्ञात अशा मार्गांनीं मी त्यांस चालवीन;
त्यांच्यापुढें अंधकार प्रकाश होईल व उंचसखल जागा
सपाट मैदान होईल असें करीन. ह्या गोष्टी मी करणार,
सोडणार नाहीं. १७ जे कोरींव मूर्तींवर भाव
ठेवितात, ओतींव मूर्तीला तुम्ही आमचे देव आहां
असें म्हणतात, ते उलथून पडतील व परम
लज्जित होतील.

१८ बहिऱ्यांनो, ऐका; अंधळ्यांनो, पाहा, म्हणजे
तुम्हांस दिसेल. १९ माझ्या सेवकाखेरीज कोण अंधळा
आहे? मी पाठवितों त्या माझ्या दूतासारखा कोण बहिरा
आहे? माझ्या भक्तासारखा कोण अंधळा आहे?
परमेश्वराच्या सेवकासारखा कोण अंधळा आहे? २० तूं
बहुत पाहिलें आहे तें ध्यानांत ठेवीत नाहींस; त्याचे
कान उघडे आहेत पण तो ऐकत नाहीं. २१ परमेश्वर
आपल्या न्यायपरायणतेमुळें प्रसन्न झाला व आपल्या
धर्मशास्त्राची महती व थोरवी त्यानें वाढविली. २२ तरी
हे लुटिलेले, नागविलेले लोक आहेत; ते सर्व गर्तांच्या
पाशांत सांपडले आहेत, कारागृहांत कोंडिले आहेत;
ते भक्ष्य झाले आहेत, त्यांस सोडविणारा कोणी नाहीं; ते लूट
झाले आहेत, आणि ती परत द्या असें म्हणणारा कोणी नाहीं.

२३ याकडे तुमच्यांतला कोण कान देईल?

आपुढें कोण लक्ष देऊन हें ऐकेल? २४ याकोबाला लुटीस
कोणीं जाऊं दिलें? इस्राएलास लुटारूंच्या स्वाधीन
कोणीं केलें? ज्या परमेश्वराविरुद्ध आम्हीं पाप केलें
त्यानेंच कीं नाहीं? त्याच्या मार्गांनीं ते चालेनात, त्याचें
धर्मशास्त्र ते ऐकेनात; २५ म्हणून त्यानें त्यांजवर
आपला कोप, आपला संताप व युद्धाचा गहजब यांचा
वर्षाव केला; त्याला चोहोंकडून आग लागली तरी
त्याला कळलें नाहीं; तिचा भडका झाला तरी त्यानें
त्याची पर्वा केली नाहीं.

४३ १ तरी आतां हे याकोबा, तुझा उत्पन्नकर्ता,
आणि हे इस्राएला, तुझा निर्माणकर्ता परमेश्वर,
असें म्हणतो, भिऊं नको; कारण मीं तुला
सोडविलें आहे; मीं तुला तुझ्या नांवानें हाक मारिली
आहे; तूं माझा आहेस. २ तूं जलांतून चालशील तेव्हां
मी तुजबरोबर असेन; नद्यांतून जाशील तेव्हां त्या तुला
बुडवावयाच्या नाहींत; अग्नींतून चालशील तेव्हां तूं
भाजावयाचा नाहींस; ज्वाला तुला पोळावयाची नाहीं.
३ कारण मी परमेश्वर तुझा देव आहें; मी इस्राएलाचा
पवित्र प्रभु तुझा त्राता आहें; मीं तुजकरितां मिसर
खंडादाखल दिला आहे, तुझ्याबद्दल कूश व सबा दिले
आहेत. ४ तूं माझ्या दृष्टीनें अमोल आहेस; तूं मोठ्या
योग्यतेचा आहेस व मी तुजवर प्रेम करितों, म्हणून
तुजबद्दल, तुझ्या जिवाबद्दल, मनुष्यें, राष्ट्रें, मी देईन.
५ भिऊं नको, कारण मी तुझ्याबरोबर आहें; मी
तुझा वंश उगवतीकडून आणीन; मावळतीकडून तुला मी
एकवट करीन. ६ मी उत्तरेला म्हणेन, देऊन टाक;
दक्षिणेला म्हणेन, अटकाव करूं नको; माझे पुत्र दुरून
व माझ्या कन्या दिगंतापासून घेऊन या; ७ ज्यांस
माझें नाम ठेविलें, ज्यांस माझ्या गौरवासाठीं उत्पन्न
केलें, निर्माण केलें आणि घडिलें त्या सर्वांस घेऊन या.
८ डोळे असून अंधळे, कान असून बहिरे अशा लोकांस
घेऊन या. ९ सर्व राष्ट्रें एकत्र जमोत, लोक एकवटोत;
अशा गोष्टी त्यांतला कोण सांगेल? पूर्वी घडलेल्या
गोष्टी त्यांनीं आम्हांस ऐकवाव्या; त्यांनीं आपलें खरें
करण्यास साक्षी आणावे; त्यांनीं तें ऐकून म्हणावें
कीं हें खरें आहे. १० परमेश्वराचें असें म्हणणें
आहे कीं तुम्हीं मला ओळखावें, मजवर भाव ठेवावा
व मी तोच आहें, माझ्यापूर्वी कोणी देव नव्हता व
माझ्यानंतरहि कोणी होणें नाहीं हें तुम्हांला समजावें
म्हणून तुम्ही माझे साक्षी आहां, तूं माझा निवडलेला
सेवक आहेस. ११ मीच परमेश्वर आहें, माझ्या-
शिवाय कोणी त्राता नाहीं. १२ मींच तारण विदित
केलें, प्राप्त करून दिलें व समजाविलें; तुमच्यामध्यें
कोणी अन्य देव नव्हता; म्हणून तुम्ही माझे साक्षी
आहां व मीच देव आहें असें परमेश्वर म्हणतो.
१३ येथून पुढेंहि मीच तो आहें; माझ्या हातांतून
कोणाला सोडवून घेतां येणार नाहीं; मी करितों तें
कोणाच्यानें पालटवणार?

१४ परमेश्वर तुमचा उद्धार करणारा, इस्राएलाचा
पवित्र प्रभु असें म्हणतो, तुम्हांसाठीं मीं बाबेलास निरोप
पाठविला आहे; तेथील सर्व खास्द्यांस त्यांच्या अभिमाना-
स्पद जहाजांत बसून पळावयास लावीन. १५ मी परमेश्वर
तुमचा पवित्र प्रभु आहें; मी इस्राएलाचा उत्पन्नकर्ता,
तुमचा राजा आहें. १६ जो समुद्रांत मार्ग, प्रचंड प्रवाहांत
वाट करितो, १७ ज्यानें रथ व घोडे, सैन्य व वीर यांस
बाहेर काढिल्यामुळें ते एकत्र पडले आहेत,
त्यांच्यानें उठवत नाहीं, ते विझले आहेत, वातीप्रमाणें
मालवले आहेत, असा जो परमेश्वर तो म्हणतो कीं:
१८ पूर्वीच्या गोष्टींची आठवण करूं नका, जुन्या गोष्टी
मनांत आणूं नका. १९ पाहा, मी एक नवीन गोष्ट करणार
आहें; आतांच ती उद्भवत आहे; तुम्ही ती पाहणार
नाहीं काय? मी अरण्यांत सडक करीन, मरुभूमीत नद्या
वाहवीन. २० वनपशु, कोल्हे व शहामृग माझें स्तवन करि-
तील; कारण मी आपल्या लोकांस, आपल्या निवडलेल्यांस,
पिण्यासाठीं अरण्यांत जलें, मरुभूमींत नद्या देणार; २१ मीं
आपल्यासाठीं निर्माण केलेले लोक माझें स्तवन करितील.

२२ हे याकोबा, तूं तर माझा धावा केला
नाहीं; हे इस्राएला, माझा तुला कंटाळा आला. २३ तूं
मला होमार्पण करण्यासाठीं मेंढरें आणिलीं नाहींत;
आणि मला यज्ञ करून माझें गौरव केलें नाहीं. मी

तुजवर अन्नार्पणांसाठीं सक्ती केली नाहीं, धूपाकरितां
तुला श्रम दिले नाहीं. २४ तूं पैसे देऊन मजसाठीं
अगरू विकत घेतला नाहीं, आपल्या यज्ञबलीच्या वपेनें
तूं मला तृप्त केलें नाहीं; तर तूं आपल्या पातकांची
मजवर सक्ती केली, तूं आपल्या दुष्कर्मांनीं मला शिणविलें.
२५ मी, आपल्याकरितां तुझे अपराध पुसून
टाकितों; मीच तो; तुझीं पातकें स्मरत नाहीं. २६ मला
स्मरण दे; आपण एकमेकांशीं वाद करूं; तुझें खरें
ठरावें म्हणून आपली बाजू सांग. २७ तुझ्या मूळ-
पुरुषानें पातक केलें, तुझे मध्यस्थ माझ्याशीं फितुरी
करीत आले आहेत; २८ म्हणून मीं पवित्र अधिपतींस
अपवित्र ठरविलें; याकोबाला शापवश व इस्राएलास
निंदावश केलें आहे.

४४ १ तर आतां माझ्या सेवका याकोबा, माझ्या
निवडलेल्या इस्राएला, ऐक; २ परमेश्वर तुझा
निर्माणकर्ता, गर्भस्थानापासून तुझा घडणारा व साहाय्यकर्ता
असें म्हणतो; हे माझ्या सेवका याकोबा, माझ्या निवडलेल्या
यशुरूना, भिऊं नको. ३ कारण मी तृषित भूमीवर पाणी
आणि रुक्ष भूमीवर जलधारा ओतीन; मी तुझ्या
संतानावर माझ्या आत्म्याची व तुझ्या संततीवर
माझ्या आशीर्वादाची वृष्टि करीन; ४ वाहत्या पाण्या-
जवळ जसें वाळुंज उगवतें, तसे ते गवतामध्यें उगव-
तील. ५ तेव्हां कोणी म्हणेल, मी परमेश्वराचा आहें;
कोणी याकोबाचें नांव घेईल; कोणी आपल्या हातानें,
मी परमेश्वराचा, असें लिहील आणि इस्राएल हें
उपनांव घेईल.

६ इस्राएलाचा राजा परमेश्वर, त्याचा उद्धारकर्ता,
सेनाधीश परमेश्वर म्हणतो; मी आदि आहें, मी अंत
आहें; मजवेगळा देव नाहींच. ७ मीं प्राचीन काळच्या
लोकांची स्थापना केली तेव्हांपासून मजसारखा
संदेश प्रगट करणारा कोण आहे? कोणी असला तर
त्यानें बोलावें व मजपुढें प्रतिपादन करावें; त्यांनीं
भावी गोष्टी व आतां होणाऱ्या गोष्टी सांगाव्या. ८ भय-
भीत होऊं नका; थरथर कांपूं नका; मीं मागेंच तुला
हें ऐकविलें व कळविलें कीं नाहीं? तुम्ही माझे साक्षी
आहां, मजवेगळा कोणी देव आहे काय? मजवेगळा
कोणी दुर्ग नाहीं; मला कोणी ठाऊक नाहीं.

९ कोरींव मूर्ति घडणारे सर्व शून्यवत् आहेत;
त्यांचे रम्य विषय कांहीं कामाचे नाहींत; त्याविषयीं साक्ष
देणाऱ्यांस दृष्टि नाहीं अगर अक्कल नाहीं; म्हणून
ती देणाऱ्यांस लज्जा प्राप्त होईल. १० हा देव कोणी
घडिला? ही मूर्ति कोणीं व्यर्थ ओतिली? ११ पाहा,
त्याचे सर्व अनुयायी फजीत होतील; ही मूर्ति घडविणारे
मनुष्यच आहेत; ते सर्व एकत्र जमोत, पुढें येवोत,
भयभीत होवोत, ते सारे लज्जित होवोत.

१२ लोहार छिनी पाजवितो, तो पेटलेल्या कोळशांनीं
काम करितो, हातोड्यांनीं मूर्तीला आकार आणितो; तो
आपल्या बाहुबलानें ती घडितो; त्याला भूक लागते व त्याची
शक्ति गळते; तो पाणी प्याला नाहीं तर व्याकुळ होतो.
१३ सुतार सूत धरितो; गेरूनें आखणी करितो; कोरण्यां-
नीं कोरितो व कैवारानें खुणा करितो; आणि ती घरांत
ठेवण्याजोगी व्हावी म्हणून तिला मनुष्याचा आकार व
सौंदर्य देतो. १४ कोणी आपणासाठीं गंधसरू तोडितो;
सरू व अल्लोन झाडें घेतो; तो वनवृक्षांतून जून झाडें
निवडितो; तो देवदारूचें झाड लावितो. तें पावसानें
वाढतें. १५ तें मनुष्यास सर्पणाच्या कामीं पडतें;
त्यांतलें कांहीं लाकूड घेऊन त्यानें तो शेक घेतो; तें
पेटवून त्यावर भाकरी भाजितो; तो त्याचा देवही
बनवितो व त्याच्या पायां पडतो; तो त्याची कोरींव मूर्ती
करितो व तिचें भजनपूजन करितो. १६ त्यांतलें अर्धें
लाकूड तो अग्नींत जाळितो; त्या अर्ध्यावर मांस
भाजून खातो व तृप्त होतो; तो शेकतांना म्हणतो,
मला ऊब येत आहे, मला शेक लागत आहे. १७ तो
त्याच्या उरलेल्या भागाचा देव घडितो, म्हणजे कोरींव
मूर्ति आपल्यासाठीं बनवितो; तो तिच्या पायां पडतो,
तिचें भजनपूजन करितो, तिची प्रार्थना करितो; तो
तिला म्हणतो, माझें तारण कर, तूं माझा देव आहेस.

१८ अशा मूर्तीस कळत नाहीं, समजत नाहीं; त्यांचे
डोळे लिंपिले असल्यामुळें त्यांस दिसत नाहीं; त्यांचीं हृदयें
लिंपिलीं असल्यामुळें त्यांना समजत नाहीं. १९ कोणी हें

ध्यानांत आणीत नाहीं; त्याचा अर्धा भाग आपण अग्नींत
जाळिला, त्याच्या निखाऱ्यांवर भाकर भाजिली, मांस
भाजून खाल्लें आणि त्याच्या अवशेषाची अमंगल वस्तु
मी कशी बनवूं ? झाडापासून काढिलेल्या लाकडाच्या
पायां मी कसा पडूं ? असें म्हणण्याइतकें कोणाला
ज्ञान नाहीं, अक्कल नाहीं. २० तो राख भक्षितो, त्याचें
हृदय मूढ झाल्यामुळें तो बहकला आहे; तो आपला
जीव बचावीत नाहीं; माझ्या उजव्या हातांत आहे ती
साक्षात् लबाडी नव्हे काय ? असें तो म्हणत नाहीं.

२१ हे याकोबा, हे इस्राएला, ह्या गोष्टी स्मरणांत
ठेव; तूं माझा सेवक आहेस; मीं तुला घडिलें आहे,
तूं माझा सेवक आहेस; हे इस्राएला, तुझा मला विसर
पडावयाचा नाहीं. २२ तुझे अपराध धुक्याप्रमाणें,
तुझीं पातकें अभ्राप्रमाणें मीं नाहींतशीं केलीं आहेत;
मजकडे फीर, कारण मीं तुला उद्धरिलें आहे. २३ हे
आकाशा, जयघोष कर, कारण परमेश्वरानें हें केलें
आहे; अहो पृथ्वीच्या अधोभागांनो, हर्षनाद करा;
अहो पर्वतांनो, हे वना, हे त्यांतील प्रत्येक वृक्षा,
तुम्हीं जयजयकार करा; कारण परमेश्वरानें याकोबास
उद्धरिलें आहे; तो इस्राएलाच्या ठायीं आपला
प्रताप प्रगट करितो.

२४ तुझा उद्धारकर्ता, गर्भावस्थेपासून तुला घडणारा
परमेश्वर म्हणतो, मी वस्तुमात्राचा कर्ता परमेश्वर
आहें; मीं एकट्यानें आकाश पसरिलें, पृथ्वीचा विस्तार
केला, तेव्हां मजजवळ कोण होतें ? २५ खोट्या
संदेष्ट्यांचीं चिन्हें खोटीं करणारा, दैवज्ञांस वेडे ठर-
विणारा, ज्ञान्यांस मागें सारून त्यांचें ज्ञान मूर्खत्व
ठरविणारा मी आहें. २६ मी आपल्या सेवकाचा शब्द
खरा करणारा, आपल्या दूतांचीं संदेशवचनें सिद्धीस
नेणारा आहें; मी यरुशलेमाविषयीं म्हणतों, त्यांत वस्ती
होवो; यहूदाच्या नगरांविषयीं म्हणतों, तीं बांधण्यांत
येवोत; त्यांच्या उजाड झालेल्या स्थलांचा जीर्णोद्धार मी
करीन; २७ मी खोल पाण्याच्या डोहास म्हणतों, कोरडा
हो, मी तुझे प्रवाह आटवीन; २८ मी कोरेशाविषयीं
म्हणतों, तो माझा मेंढपाळ आहे, तो माझे सर्व
मनोरथ सिद्धीस नेईल. तो यरुशलेमाविषयीं म्हणेल,
तें बांधण्यांत येईल, मंदिराचा पाया घालण्यांत येईल.

४५ १ परमेश्वर म्हणतो, कोरेश माझा अभिषिक्त
आहे; त्याच्यापुढें राष्ट्रें पादाक्रांत करण्यासाठीं
मीं त्याचा उजवा हात धरिला आहे; राजांस
आपल्या कमरा सोडावयास मी लावितों; त्याच्यापुढें
दरवाजे उघडतील, वेशी बंद राहणार नाहींत, असें
मी करितों. २ परमेश्वर त्याला म्हणतो, मी तुझ्यापुढें
चालेन व उंचसखल असलेलें सपाट करीन; मी
पितळेच्या दरवाजांचे फोडून तुकडे करीन, लोखंडाचे
अडसर मोडून टाकीन. ३ तुला अंधारांतील निधि व
गुप्त स्थलीं लपविलेलें धन देईन, म्हणजे तूं समजशील
कीं तुला तुझ्या नांवानें हाक मारणारा मी परमेश्वर
इस्राएलाचा देव आहें. ४ माझा सेवक याकोब, माझा
निवडलेला इस्राएल याच्यामुळें मी तुझें नांव घेऊन
हाक मारिली; तूं मला ओळखीत नव्हतास तरी मी
तुला उपनांव दिलें. ५ मीच परमेश्वर, अन्य कोणी
नव्हे, मजवेगळा देव नाहीं; तूं मला ओळखत नव्हतास
तरी मीं तुला सज्ज केलें. ६ येणेंकरून सर्वांनीं जाणावें
कीं उगवतीपासून मावळतीपर्यंत मजवेगळा कोणी
नाहीं; मीच परमेश्वर, अन्य कोणी नव्हे. ७ प्रकाश-
कर्ता, अंधाराचा उत्पन्नकर्ता, शांतीचा जनक व
अरिष्टाचा उत्पादक मी आहें; हें सर्व करणारा मी
परमेश्वर आहें.

८ हे आकाशा, वरून वृष्टि कर; आभाळ धार्मिकतेचा
पाऊस पाडो; पृथ्वी उकलो, तारण आणि धार्मिकता हीं
प्रफुल्लित होवोत; तीं एकत्र उगवोत; मी परमेश्वर
त्याचा उत्पन्नकर्ता आहें.

९ जो आपल्या उत्पन्नकर्त्याशीं वाद घालितो त्यास
धिक्कार असो; तो मातीच्या खापऱ्यांपैकीं एक आहे.
तूं काय करितोस असें माती आपल्या घडणाऱ्याला म्हणेल
काय ? तुला हात नाहींत असें तुझें कृत्य तुला म्हणेल काय ?
१० तूं काय जन्म देतोस असें जो बापाला म्हणतो, आणि तूं
काय प्रसवतेस असें जो आईला म्हणतो त्याला धिक्कार असो !

११ इस्राएलाचा पवित्र प्रभु व त्याला घड-

घडणारा परमेश्वर म्हणतो, होणाऱ्या गोष्टींविषयीं मला कोण
विचारणार? माझे पुत्र व माझ्या हातचें कृत्य हीं पाहा,
असें मला कोण सांगणार? १२ मींच पृथ्वी केली व तीवर
मनुष्यें उत्पन्न केलीं; मीं म्हणजे माझ्या हातांनीं आकाश
पसरिलें; मीं आकाशसेनेस आज्ञा दिली. १३ मींच
न्याय्य दृष्टीनें कोरेशाची उठावणी केली; मी त्याचे सगळे
मार्ग सरळ करीन; तो माझें नगर बांधील व कांहींएक
मोल अथवा मोबदला न घेतां बंदिवान झालेल्या माझ्या
लोकांस मुक्त करील, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.

१४ परमेश्वर असें म्हणतो, मिसराच्या श्रमाचें फळ
कुशाची कमाई व धिप्पाड सबाई लोक हीं तुजजवळ
येऊन तुझीं होतील; ते तुझ्या मागून येतील; बेड्या
घातलेले येतील, तुला दंडवत घालतील; ते तुला विनंति
करून म्हणतील कीं खरोखर तुजजवळ देव आहे, त्याज-
शिवाय अन्य देव नाहीं, दुसरा देवच नाहीं. १५ हे
इस्राएलाच्या देवा, तारका, तूं खचीत गूढ देव आहेस.
१६ ते सर्व लज्जित व फजीत झाले आहेत; एकंदरीनें
मूर्तिकारांची फजिती उडाली आहे. १७ इस्राएलास
परमेश्वराकडून सर्वकाळचा उद्धार प्राप्त झाला आहे;
तुम्ही अनंतकाळ लज्जित व फजीत होणार नाहीं.

१८ आकाशाचा उत्पन्नकर्ता तोच देव, पृथ्वीचा
घडणारा व कर्ता तोच; त्यानें तिची स्थापना केली; त्यानें
ती निर्जन राहावी म्हणून उत्पन्न केली नाहीं, तर तिजवर
लोकवस्ती व्हावी म्हणून घडिली; तो परमेश्वर म्हणतो,
मीच परमेश्वर आहें; अन्य कोणी नव्हे. १९ मी गुप्तपणें
अंधकारमय प्रदेशाच्या स्थळीं बोललों असें नाहीं; शून्य
स्थळीं मला धुंडा, असें याकोबाच्या वंशाला मी म्हणालों
नाहीं; धर्मनीति सांगणारा, रास्त गोष्टी विदित करणारा
असा मी परमेश्वर आहें.

२० राष्ट्रांतून निभावलेल्यांनो, जमा होऊन या, सर्व
मिळून जवळ या; जे असल्या कोरीव मूर्ति म्हणजे केवळ
लाकडें मिरवितात व उद्धार न करणाऱ्या दैवतांची प्रार्थना
करितात ते ज्ञानशून्य आहेत. २१ बोला, त्यांला समोर
आणा; त्यांस आपआपसांत विचार करूं द्या; हें कोणीं पुरातन
काळापासून ऐकविलें? हें कोणीं पूर्वीपासून कळविलें?
मीं परमेश्वरानेंच नव्हे काय? मजवेगळा देव नाहीं;
मजवांचून न्यायी व तारणकर्ता दुसरा कोणी देव नाहीं.
२२ पृथ्वीच्या सर्व सीमांनो, मजकडे वळा, उद्धार पावा;
कारण मी देव आहें, अन्य कोणी नव्हे. २३ मीं आपली
शपथ वाहिली आहे; माझ्या न्याय्यत्वाच्या मुखांतून
वचन निघालें आहे तें बदलणार नाहीं; तें हें कीं मज-
पुढें प्रत्येक जण गुडघा टेकील, प्रत्येक जिव्हा माझ्या
ठायीं निष्ठेची शपथ वाहील. २४ मजविषयीं म्हणतील
कीं केवळ परमेश्वराच्या ठायीं न्याय्यत्व व सामर्थ्य
आहे; त्याला प्रत्येक जण शरण येईल; त्याजवर संतापलेले
सर्व लज्जित होतील. २५ इस्राएलाचा वंश परमेश्वराच्या
ठायीं नीतिमान् ठरेल व त्याचा अभिमान बाळगील.

४६ १ बेल खचला आहे, नबो वाकला आहे;
त्यांच्या मूर्ति पाठाळांवर घातल्या आहेत;
तुमच्या मिरवणुकीच्या मूर्ति थकलेल्या जनावरां-
वर ओझ्याप्रमाणें लादिल्या आहेत. २ तीं एकदम
वाकलीं खचलीं आहेत; त्यांना हें ओझें सावरतां आलें
नाहीं. तीं स्वतःच पकडून नेण्यांत आलीं आहेत.

३ हे याकोबाच्या घराण्या, इस्राएल घराण्यांतील
सर्व अवशिष्ट लोकहो, गर्भवासापासून मीं तुमचें ओझें
वाहिलें; उदरांत होतां तेव्हांपासून तुम्हांस मीं वाग-
विलें; माझें ऐका. ४ तुमच्या वृद्धापकाळापर्यंतहि मीच
तो आहें; तुमचे केस पिकत तोंपर्यंत मी तुम्हांस
वागवीन; निर्माणकर्ता मीच आहें, वागविणारा मीच
आहें; मी खांद्यावर वागवून तुमचा बचाव करीन.
५ माझी कोणाशीं तुलना कराल? मला कोणाशीं
समान लेखाल? माझी कोणाशीं बरोबरी कराल कीं जेणें-
करून ते मजशीं समान ठरतील? ६ जे थैलींतून सोनें
ओतितात, जे कांट्यानें रुपें तोलून देतात, त्यांचें दैवत
घडविण्यासाठीं ते सोनारास मजुरीनें लावितात, ते
त्याच्या पायां पडतात, त्याला दंडवत घालितात; ७ ते
त्याला उचलून खांद्यावर घेतात, त्याला नेऊन त्याच्या
स्थानीं स्थापितात; तेथें तो उभा असतो, आपल्या
स्थानावरून हालत नाहीं; त्याचा धावा केल्यास तो येत
नाहीं, त्यांस संकटांतून तारीत नाहीं.

८ अहो फितुरी लोकांनो, हें लक्षांत आणून दृढ व्हा; हें ध्यानांत वागवा. ९ प्राचीन काळापासून घडलेल्या गत गोष्टी स्मरा आणि समजा कीं मीच देव आहें, दुसरा कोणी देव नव्हे, मजसमान कोणीच नाहीं. १० मी आरंभींच शेवट कळवितों, होणाऱ्या गोष्टी घडण्यापूर्वी त्या मी प्राचीन काळापासून सांगत आलों आहें; माझा संकल्प सिद्ध होईल, माझा मनोरथ मी पूर्ण करीन. ११ उगवतीकडून मी हिंस्र पक्षी बोलावितों, माझें कार्य साधणारा मी दूर देशाहून बोलावितों, मी बोलतों असें घडवूनहि आणितों, मी योजितों तें शेवटास नेतों.

१२ धार्मिकतेपासून दूर असलेल्या अहो कठोर मनाच्या लोकांनो, माझें ऐका. १३ मी आपला न्याय जवळ आणीत आहें, आतां तो दूर नाहीं; मजकडून होणाऱ्या उद्धारास विलंब लागणार नाहीं; मी सीयोनांत उद्धार स्थापितों, इस्राएलास माझें गौरव देतों.

४७ १ अगे बाबेलाच्या कुमारिके, खालीं उतरून धुळींत बैस; खास्द्यांच्या कन्ये, सिंहासन सोडून भूमीवर बैस; कारण तुला यापुढें नाजूक व सुकुमार म्हणणार नाहींत. २ जातें घेऊन धान्य दळ, आपला बुरखा मागें सार, बुरख्याचा घोळ उचलून धर, मांड्या उघड्या करून नदीनाल्यांतून पार चालत जा. ३ तुझी काया उघडी पडूं दे; तुझी लज्जा दिसूं दे; मी सूड घेईन, कोणाची गय करणार नाहीं. ४ आमच्या उद्धारकर्त्याचें नाम सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा पवित्र प्रभु, असें आहे. ५ अगे खास्द्यांच्या कन्ये, गप्प बैस, अंधारांत जाऊन लप, कारण लोक यापुढें तुला राज्यांची स्वामिनी म्हणणार नाहींत. ६ मी आपल्या लोकांवर रुष्ट झालों, मीं आपलें वतन अपवित्र केलें; त्यांस तुझ्या हातीं दिलें. तूं त्यांजवर किमपि दया केली नाहीं, वृद्धांवर तूं आपलें भारी जूं लादिलें. ७ तूं म्हणालीस, मी सर्वकाळ स्वामिनी राहीन, म्हणून तूं ह्या गोष्टी ध्यानांत धरिल्या नाहींत, त्यांचा परिणाम लक्षांत आणिला नाहीं.

८ अगे विलासिनी, जी तूं निश्चिंत बसतेस व मनांत म्हणतेस, मीच आहें, मजवेगळी कोणी नाहीं, मी विधवा होणार नाहीं, अपत्यहीनतेचा अनुभव मला घडणार नाहीं, ती तूं हें ऐक: ९ अपत्यहीनता व वैधव्य हीं दोन्ही एकाच दिवशीं, एकाच क्षणीं तुला प्राप्त होतील; तुझे बहुविध मंत्रतंत्र व तुझीं विपुल चेटकें यांस न जुमानितां तीं तुजवर पूर्णपणें गुजरतील. १० कारण तूं आपल्या दुष्टतेवर भिस्त ठेविली; तूं म्हणालीस, कोणी मला पाहत नाहीं; तुझें शहाणपण व तुझें ज्ञान यांनीं तुला बहकविलें म्हणून तूं आपल्या मनांत म्हणालीस, मीच आहें, मजवेगळी कोणी नाहीं. ११ यामुळें मंत्रतंत्रांनीं निवारितां येणार नाहीं अशी विपत्ति तुजवर येईल; खंडणी देऊन टाळितां येणार नाहीं असें अरिष्ट तुजवर येईल; तुझ्या ध्यानींमनीं नाहीं असा नाश तुला एकाएकीं गांठील.

१२ तर तुझे मंत्रतंत्र व बहुविध चेटकें, ज्यांचा जप तूं तरुणपणापासून करून थकलीस, तीं आतां चालीव; कदाचित् त्याचा तुला उपयोग होईल, त्यांनीं कदाचित् तुझा धाक बसेल. १३ तूं पुष्कळ मसलती करितांकरितां थकलीस; तर तुजवर काय काय येणार हें तुला दर चंद्रदर्शनाच्या वेळीं कळविणारे ज्योतिषी व नक्षत्रें पाहणारे पुढें येवोत; त्यांच्यानें तुझा बचाव होईल तर ते करोत. १४ पाहा, ते धसकटासारखे झाले आहेत; अग्नीनें त्यांस भस्म केलें आहे; ज्वालेच्या तडाक्यांतून त्यांला स्वतांचा बचाव करितां येईना. हा शेकत बसण्याचा विस्तव नव्हे, भोवतीं बसण्याच्या शेगडीचा अग्नि नव्हे. १५ तूं ज्यासाठीं शिणलीस त्या तुझ्या लोकांची अशी गत झाली आहे; तुझ्या तारुण्यापासून तुझ्याबरोबर व्यापार करणारे भटकत भटकत आपआपल्या स्थानीं जात आहेत; तुझा बचाव करणारा कोणी नाहीं.

४८ १ हे याकोबाच्या घराण्या, ऐक, तुला, इस्राएल हें नांव आहे, तूं यहूदाच्या झऱ्यांतून निघाला आहेस; तूं परमेश्वराच्या नामाची शपथ वाहतोस व इस्राएलाच्या देवाचें स्तवन करितोस, पण सत्यानें व धर्मानें नव्हे. २ ते तर आपणांस पवित्र नगराचे म्हणवितात व इस्राएलाच्या देवाचा आश्रय करितात; त्याचें नाम सेनाधीश परमेश्वर आहे.

३ मीं मागेंच पूर्वीच्या गोष्टी सांगितल्या; माझ्या
मुखांतून त्या निघाल्या, मीं त्या कळविल्या; मी त्या
अकस्मात् करूं लागलों, आणि त्या घडून आल्या. ४ तूं
हट्टी आहेस, तुझ्या मानेचे स्नायु जसें काय लोखंड व तुझें
कपाळ जसें काय पितळ आहे हें मला ठाऊक होतें; ५
म्हणून हें बहुत काळापूर्वीच तुला कळविलें, तें घडाव-
याच्यापूर्वीच तुला विदित केलें; नाहीं तर तूं म्हणाला
असतास कीं माझ्या मूर्तीनें तें केलें; माझ्या कोरींव
मूर्तीच्या आज्ञेनें व माझ्या ओतींव मूर्तीच्या आज्ञेनें तें
झालें. ६ तूं हें ऐकलें आहे, हें सर्व पाहा; तुम्हांला हें
कबूल करावयाला नको काय? आतांपासून मी नव्या
गोष्टी, गुप्त गोष्टी, तुला माहीत नाहींत अशा गोष्टी तुला
ऐकवितों. ७ त्या आतांच उद्भवल्या, फार मागें नाहींत;
त्या तुला आजपर्यंत ठाऊक नव्हत्या, नाहीं तर तूं म्हण-
तास, पाहा, त्या मला आधींच ठाऊक होत्या. ८ तूं त्या
ऐकल्या नव्हत्या; जाणिल्या नव्हत्या; प्राचीन काळा-
पासून तुझे कान उघडले नव्हते, कारण तूं विश्वासघातकी
आहेस; गर्भवासापासून तुला फितुरी हें नांव पडलें
आहे, हें मला ठाऊक होतें. ९ माझ्या नामाप्रीत्यर्थ
मीं आपला क्रोध लांबणीवर टाकिला; तुझा उच्छेद
करूं नये म्हणून माझ्या प्रशंसेप्रीत्यर्थ मीं स्वतांला आव-
रिलें. १० मीं तुला गाळिलें आहे, पण रुप्याप्रमाणें
नव्हे; मीं दुःखरूप भट्टींत तुला कसोटीस लाविलें आहे.
११ माझ्या, केवळ माझ्याच प्रीत्यर्थ हें मी करितों;
माझ्या नामाची अप्रतिष्ठा कां व्हावी! माझें गौरव मी
इतरांस देत नाहीं.

१२ हे याकोबा, मीं बोलावलेल्या इस्राएला, माझें
ऐक; मी तोच आहें; मी आदि आहें व अंतहि आहें.
१३ माझ्याच हातानें पृथ्वीचा पाया घातला; माझ्या
उजव्या हातानें आकाश विस्तारिलें; मीं हाक मारितांच
तीं मजपुढें एकत्र उभीं राहतात. १४ तुम्ही सर्व जमा
व्हा, ऐका; त्या मूर्तींपैकीं कोणी ह्या गोष्टी कळविल्या?
परमेश्वरास प्रिय असलेला मनुष्य आपल्या इच्छेप्रमाणें
बाबेलचें करील; तो आपलें भुजबल खास्द्यांवर चालवील.
१५ मी, केवळ मीच बोललों आहें; मीं त्याला बोलाविलें
आहे, त्याला आणिलें आहे. त्याचा आयुष्यक्रम सफल
होईल. १६ तुम्ही मजजवळ या, हें ऐका; प्रारंभा-
पासून मी गुप्तपणें बोललों नाहीं; तें होऊं लागल्या-
पासून तेथें मी आहेंच; आतां प्रभु परमेश्वरानें मला व
आपल्या आत्म्याला पाठविलें आहे. १७ परमेश्वर तुझा
उद्धारकर्ता, इस्राएलाचा पवित्र प्रभु, म्हणतो; तुला जें
हितकारक तें मी परमेश्वर तुझा देव तुला शिकवितों;
ज्या मार्गानें तुला गेलें पाहिजे त्यानें तुला नेतों. १८ तूं
माझ्या आज्ञा लक्षपूर्वक ऐकतास तर बरें होतें;
मग तुझी शांति नदीसारखी, तुझी धार्मिकता
समुद्राच्या लाटांसारखी झाली असती; १९ तुझा वंश
रेतीइतका, तुझ्या पोटचें संतान रेतीच्या कणांइतकें
झालें असतें; त्याचें नांव मजसमोरून उच्छेद पावलें
नसतें, तें नष्ट झालें नसतें.

२० तुम्ही बाबेलांतून निघा, खास्दी लोकांमधून
जयजयकार करीत पळत सुटा; हें कळवा, ऐकवा,
दिगंतापर्यंत असें पुकारा कीं परमेश्वरानें आपला सेवक
याकोब याचा उद्धार केला आहे. २१ त्यांस त्यानें रुक्ष
भूमीवरून नेलें, तेथें त्यांस तहान लागली नाहीं;
त्यांच्यासाठीं त्यानें खडकांतून पाणी वाहविलें; त्यानें
खडक फोडिला तों पाणी खळखळां वाहिलें. २२ पर-
मेश्वर म्हणतो, दुर्जनास शांति नसते.

४९

१ द्वीपांनो, माझें ऐका; दूरदूरच्या राष्ट्रांनो,
कान द्या; मीं गर्भावस्थेंत असतांनाच पर-
मेश्वरानें मला बोलाविलें; मी मातेच्या उदरांत
होतों तेव्हांच त्यानें माझें नांव घेतलें. २ त्यानें माझें
मुख तीक्ष्ण तरवारीसारखें केलें; त्यानें मला आपल्या
हाताच्या छायेखालीं लपविलें; त्यानें मला चकचकीत
बाणासारखें करून आपल्या भात्यांत गुप्त ठेविलें. ३ तो
मला म्हणाला, तूं माझा सेवक आहेस; मला शोभा आण-
णारा तूं इस्राएल आहेस. ४ मी तर म्हणालों होतों कीं
मीं व्यर्थ श्रम केले, मीं आपलें बळ उगीच व निरर्थक
वेचिलें; तथापि माझा न्याय परमेश्वराच्या हातीं आहे;
माझें प्रतिफळ माझ्या देवाच्या हातीं आहे.

५ मीं याकोबास त्याजकडे परत आणावें,
त्याजजवळ इस्राएल एकत्र जमवावे म्हणून आपला सेवक
होण्यासाठीं ज्या परमेश्वरानें मला गर्भाशयांत घडिलें, ज्या
परमेश्वराच्या दृष्टीनें मला मान मिळाला व जो माझा देव
माझें सामर्थ्य झाला, ६ तो परमेश्वर म्हणतो : याको-
बाच्या वंशाचा उद्धार करावा, इस्राएलाच्या रक्षिलेल्या
लोकांस परत आणावें म्हणून तूं माझा सेवक व्हावें यांत
कांहीं मोठेंसें नाहीं; तर मजकडून होणारें तारण तूं
दिगंतापर्यंत न्यावें म्हणून मी तुला राष्ट्रांचा प्रकाश
असा नेमितों. ७ ज्याला माणसें तुच्छ लेखितात,
ज्याला लोक अमंगल मानितात, जो अधिपतींचा दास
आहे, त्याला इस्राएलाचा उद्धारकर्ता, इस्राएलाचा पवित्र
प्रभु जो परमेश्वर, तो म्हणतो, राजे तुला पाहून उठून
उभे राहतील, अधिपति तुला नमन करितील; परमेश्वर
जो सत्यवचनी आहे, इस्राएलाचा पवित्र प्रभु आहे, त्यानें
तुला निवडून घेतलें आहे म्हणून असें होईल.

८ परमेश्वर म्हणतो, प्रसादसमयीं मीं तुझें ऐकलें,
उद्धारदिनीं मीं तुला साहाय्य केलें; देशाचा उत्कर्ष व्हावा,
उजाड झालेल्या वतनांची पुनः वांटणी व्हावी म्हणून मी
तुझें रक्षण करितों व लोकांच्या कराराप्रीत्यर्थ तुला
नेमितों. ९ तूं बंदींत असलेल्यांस म्हणावें, बाहेर या;
अंधारांत आहेत त्यांस म्हणावें, उजेडांत या. ते रस्त्यां-
वर चरतील, सगळ्या उजाड टेकड्यांवरहि त्यांस चारा
मिळेल. १० त्यांस तहानभूक लागणार नाहीं; झळई व
ऊन यांची बाधा त्यांस होणार नाहीं; कारण त्यांजवर
दया करणारा त्यांचा नेता होईल; पाण्याच्या झऱ्यांवर तो
त्यांस नेईल. ११ मी आपले सर्व पर्वत धोपट मार्ग
करीन, माझे राजमार्ग उंच होतील. १२ हे पाहा, हे
लांबून येत आहेत; हे पाहा, हे उत्तरेकडून व पश्चिमे-
कडून येत आहेत; हे सीनी लोकांच्या देशांतून येत
आहेत. १३ हे आकाशा, जयजयकार कर; हे पृथ्वी,
आनंद कर; अहो पर्वतांनो, जयघोष करा; कारण
परमेश्वरानें आपल्या लोकांचें सांत्वन केलें आहे,
आपल्या पीडलेल्या लोकांवर दया केली आहे.

१४ ह्यावर सीयोन म्हणालें, परमेश्वरानें माझा त्याग
केला आहे; प्रभु मला विसरला आहे. १५ स्त्रीला
आपल्या पोटच्या मुलाची करुणा येणार नाहीं एवढा
तिला आपल्या तान्ह्या बाळाचा विसर पडेल काय ?
कदाचित् स्त्रियांना विसर पडेल, पण मी तुला विसर-
णार नाहीं. १६ पाहा, मीं तुला आपल्या तळहातांवर
कोरून ठेविलें आहे; तुझे कोट नित्य माझ्या दृष्टीसमोर
आहेत. १७ तुझीं मुलें त्वरेनें येत आहेत; तुझा
नाश करणारे, तुला उजाड करणारे, तुझ्यांतून निघून
जात आहेत. १८ आपले डोळे वर कर, चोहोंकडे
पाहा; ते सर्व एकवट होऊन तुजकडे येत आहेत.
परमेश्वराचें वचन असें आहे कीं माझ्या जिवाची
शपथ, तूं खरोखर त्या सर्वांस अलंकाराप्रमाणें लेशील;
नववधूप्रमाणें तूं त्यांस आपल्या अंगावर घालिशील.
१९ तुझी उजाड व ओसाड स्थळें व तुझी उद्ध्वस्त
भूमि यांविषयीं म्हणशील तर तुझ्या ठायीं वस्तीला जागा
पुरणार नाहीं; तुला ग्रासून टाकणारे दूर गेले आहेत.
२० तुझीं वियुक्त झालेलीं मुलें तुझ्या कानांत असें
म्हणणार कीं आम्हांला ही जागा फार संकुचित आहे,
आम्हांला वस्ती करण्यास जागा दे. २१ तेव्हां तूं
आपल्या मनांत म्हणशील, माझीं मुलें तर हिरावून
नेलीं आहेत, मी वांझ आहें, मी स्वदेशास मुकलें
आहें, व परागंदा झालें आहें, अशा मजसाठीं यांस
जन्म कोणीं दिला ? यांस लहानाचें मोठें कोणीं केलें ?
पाहा, मी एकटीच उरलें होतें; हीं कोठें होतीं ?

२२ प्रभु परमेश्वर म्हणतो, पाहा, मी राष्ट्रांला आपल्या
हातानें इशारा करीन, लोकांसमोर आपला झेंडा उभा-
रीन; ते तुझ्या पुत्रांस आपल्या उराशीं धरून आणि-
तील; तुझ्या कन्यांस खांद्यांवर बसवून पोहचत्या करि-
तील. २३ राजे बापासमान तुझे पालक होतील, त्यांच्या
राण्या तुझ्या दाया होतील; तीं तुला भूमीपर्यंत लवून
नमन करितील, तुझ्या पायांची धूळ चाटितील; तेव्हां
मी परमेश्वर आहें, माझी आस धरणारे फजीत होत
नाहींत, असें तुला कळून येईल.

२४ वीरांपासून लूट हिसकावून घेतां येईल काय ? पक-
डून नेलेल्या धार्मिक जनांची सुटका होईल काय ? २५ परमे-

श्वर म्हणतो, हो, वीरानें केलेले बंदिवान हिसकावून घेण्यांत
येतील; जुलमी पुरुषानें केलेली लूट सोडविण्यांत येईल;
कारण तुजशीं युद्ध करणाऱ्याबरोबर मी युद्ध करीन व तुझ्या
मुलांचा उद्धार करीन. २६ तुझा छळ करणाऱ्यांस स्वतां-
चेंच मांस खावयास लावीन; नव्या द्राक्षारसानें जसे लोक
मस्त होतात तसे ते आपल्या रक्तानें मस्त होतील; या-
वरून, मी परमेश्वर तुझा त्राता, तुझा उद्धारकर्ता, याकोबा-
चा समर्थ प्रभु आहें हें सर्व मानवजातीला समजेल.

१ परमेश्वर म्हणतो, तुमच्या आईस मीं
५० सोडून दिल्याचें सूटपत्र कोठें आहे? ज्यास
तुम्हांला विकिलें तो माझा सावकार कोणता?
पाहा, तुमच्या दुष्कर्मांमुळें तुमचा विक्रय झाला; तुमच्या
अपराधामुळें तुमच्या आईस सोडावें लागलें. २ मी
आलों तेव्हां कोणी नव्हता; मीं हाक मारिली तेव्हां
जबाब द्यावयाला कोणी नव्हता, तें कां? मुक्त करवत
नाहीं इतका माझा हात तोकडा झाला आहे काय?
माझ्या ठायीं सोडविण्याचें सामर्थ्य नाहीं काय? पाहा,
मी आपल्या धमकीनें समुद्र कोरडा करितों, नद्यांचें रान
करितों; पाणी नसल्यामुळें त्यांतील मासे कुजून त्यांची
घाण येते, ते पाण्यावांचून मरतात. ३ मी आकाशास
काळा पेहराव लेववितों; गोणताट त्यांचें पांघरूण करितों.

४ शिणलेल्यांस बोलून धीर कसा द्यावा तें समजावें
म्हणून प्रभु परमेश्वरानें मला सुशिक्षितांची जिव्हा दिली
आहे; तो रोजरोज सकाळीं मला जागें करितो; शिष्यां-
प्रमाणें ऐकावें म्हणून माझे कान उघडितो. ५ प्रभु
परमेश्वरानें माझे कान उघडिले आहेत; मी फितूर
झालों नाहीं, मागें फिरलों नाहीं. ६ मी मारणाऱ्यांपुढें
आपली पाठ केली, केस उपटणाऱ्यांपुढें मीं आपले
गाल केले; उपमर्द व छिथू यांपासून मीं आपलें तोंड
चुकविलें नाहीं. ७ प्रभु परमेश्वर मला साहाय्य करणार
म्हणून मी लज्जित झालों नाहीं; मीं आपलें तोंड गार-
गोटीसारखें केलें; माझी फजिती होणार नाहीं हें मला
ठाऊक होतें. ८ मला नीतिमान् ठरविणारा जवळ आहे;
मजबरोबर वाद कोण करणार? आपण समोरासमोर उभे
राहूं, माझा प्रतिवादी कोण असेल त्यानें मजपुढें यावें.
९ पाहा, प्रभु परमेश्वर माझा साहाय्यकर्ता आहे, तर
मला दोषी कोण ठरविणार? ते वस्त्राप्रमाणें जीर्ण
होतील; त्यांस कसर खाऊन टाकील.

१० परमेश्वराचें भय बाळगून त्याच्या सेवकाचें
ऐकणारा असा तुमच्यामध्यें कोण आहे? जो अंधारांत
चालतो, ज्याला प्रकाश मिळत नाहीं त्यानें परमेश्वराच्या
नामावर भाव ठेवावा, आपल्या देवाचा आश्रय करावा.
११ जे तुम्ही अग्नि पेटवितां, जे तुम्ही कोलितें बाण-
वितां ते तुम्ही सर्व आपल्याच अग्नीच्या ज्वालेंत चालते
व्हा, तुम्ही स्वतः पेटविलेल्या कोलितांत जाऊन पडा.
माझ्या हातून हें तुम्हांस घडेल; तुम्ही क्लेशांत पडून
राहाल.

१ तुम्ही जे धार्मिकतेस अनुसरणारे, परमे-
५१ श्वरास शरण जाणारे, ते माझें ऐका; ज्या खडकां-
तून तुम्हांस खोदून काढिलें त्याकडे व खाणीच्या
ज्या खळग्यांतून तुम्हांस खणून काढिलें त्याकडे लक्ष
द्या. २ अब्राहाम तुमचा पिता व सारा तुमची जननी
त्यांजकडे लक्ष द्या; तो एकटा होता तेव्हां त्याला मीं
बोलाविलें व त्याला आशीर्वाद देऊन त्या एकाचे
पुष्कळ केले; ३ पाहा, परमेश्वरानें सीयोनाचें सांत्वन
केलें; त्याच्या सर्व ओसाड स्थळांचें सांत्वन केलें
आहे; त्याचें रान एदेनासारखें केलें, त्याचा निर्जल
प्रदेश परमेश्वराच्या बागेसारखा केला; आनंद व
उल्लास, उपकारस्मरण, गायनवादनाचा ध्वनि त्याजमध्यें
होत आहे.

४ माझ्या लोकांनो, मजकडे लक्ष द्या; माझ्या
प्रजे, मजकडे कान दे; कारण माझ्यापासून धर्मशास्त्र
निघेल व राष्ट्रांस प्रकाश प्राप्त व्हावा म्हणून मी आपल्या
धर्माची संस्थापना करीन. ५ माझा न्याय समीप
आला आहे, माझें उद्धारकार्य सुरू झालें आहे, माझे
भुज राष्ट्रांचा न्याय करितील; द्वीपांला माझा ध्यास
लागला आहे, त्यांचा भरवसा माझ्या बाहूंवर आहे.
६ वर आकाशाकडे आपले डोळे लावा; खालीं पृथ्वी-
कडे लक्ष द्या; कारण आकाश धुराप्रमाणें विरून
जाईल; पृथ्वी वस्त्राप्रमाणें जीर्ण होईल, तिचे रहि-

वासी चिलटांप्रमाणें मरतील; तरी माझें तारण सर्व-
काळ टिकेल; माझा न्याय भंग पावणार नाहीं.

७ हे धर्म जाणणाऱ्यांनो, माझें धर्मशास्त्र मनांत
वागविणाऱ्यांनो, तुम्ही माझें ऐका; मर्त्य मानव नांवें
ठेवितील त्यांस भिऊं नका; त्यांच्या निंदेनें घाबरूं
नका. ८ कारण वस्त्राप्रमाणें त्यांस कसर भक्षील, लोकरी-
प्रमाणें त्यांस कीड खाऊन टाकील; माझा न्याय तर
सर्वकाळ टिकेल, पिढ्यानपिढ्या राहील.

९ हे परमेश्वराच्या भुजा, जागृत हो, जागृत हो,
बलयुक्त हो; पूर्वकाळच्या दिवसांतल्याप्रमाणें, प्राचीन
युगांतल्याप्रमाणें जागृत हो. राहाबास छिन्नभिन्न कर-
णारा तूंच नव्हेस काय? मगरास विंधिणारा तूंच
नव्हेस काय? १० ज्यानें समुद्र आटविला, खोल
सागराचें जल आटविलें, उद्धरिलेले पार उतरून
जावे म्हणून सागराच्या अगाध डोहांतून मार्ग केला,
तो तूंच नव्हेस काय? ११ परमेश्वरानें उद्धरिलेले जन
परततील व जयजयकार करीत सीयोनास येतील;
त्यांच्या मस्तकीं सार्वकालिक हर्ष राहील; त्यांस आनंद
व उल्लास प्राप्त होईल; दुःख व उसासे पळ काढितील.

१२ तुमचें सांत्वन करणारा मी, केवळ मीच आहें; तूं
मर्त्य मनुष्याला, तृणवत् मानवपुत्राला भितेस असी तूं
कोण? १३ आकाश पसरणारा, पृथ्वीचा पाया घाल-
णारा परमेश्वर तुझा कर्ता, याला तूं कां विसरलीस?
जुलूम करणारा तुझा नाश करण्यास पाहत आहे
म्हणून त्याच्या क्रोधास सारा दिवस एकसारखी कां
भितेस? जुलम्याचा क्रोध उरला आहे कोठें? १४ दब-
लेला मुक्त होण्याची त्वरा करितो, तो मरणार नाहीं,
गर्तेंत पडणार नाहीं, त्याला अन्नाची वाण पडणार
नाहीं. १५ कारण मी परमेश्वर तुझा देव आहें; मी
समुद्र खवळवितों तेव्हां त्याच्या लाटा गर्जना करितात;
सेनाधीश परमेश्वर हें माझें नाम आहे. १६ मीं
आकाशाची स्थापना करावी, पृथ्वीचा पाया घालावा व तूं
माझी प्रजा आहेस असें सीयोनास म्हणावें म्हणून मीं
आपलीं वचनें तुझ्या मुखांत घातलीं; आपल्या हाताची
छाया मीं तुजवर केली.

१७ हे यरुशलेमे, जागी हो, जागी हो, ऊठ; तूं
परमेश्वराच्या हातून त्याच्या क्रोधाचा प्याला पिऊन
टाकिला आहे; झोकांडे देणारा कटोरा तूं प्यालीस,
त्यांतील थेंबहि उरला नाहीं. १८ तिनें जन्म दिलेल्या
मुलांपैकीं कोणीं तिला मार्गदर्शक नव्हता; तिनें वाढ-
विलेल्या मुलांपैकीं कोणीं तिचा हात धरिला नाहीं.
१९ तुजवर ह्या दोन गोष्टी गुदरल्या: उजाडी व नाश,
दुष्काळ व तरवार; तुझें समाधान कोण करील? मी तुझें
सांत्वन कसें करूं? २० तुझे पुत्र मूर्च्छित झाले आहेत,
पाशांत सांपडलेल्या हरिणाप्रमाणें रस्त्यांच्या नाक्यां-
नाक्यांनीं ते पडले आहेत; ते परमेश्वराच्या क्रोधानें,
तुझ्या देवाच्या धमकीनें भारिले गेले आहेत.

२१ ह्याकरितां तूं जी पीडित व मस्त झाली आहेस, पण
मद्यानें नव्हे, ती तूं हें ऐक: २२ तुझा प्रभु परमेश्वर,
आपल्या लोकांचा कैवारी जो तुझा देव, तो म्हणतो, पाहा,
झोकांडे देणारा प्याला, माझ्या क्रोधाचा कटोरा तुझ्या
हातांतून मी काढून घेतों; यापुढें तूं तो पिणार नाहींस;
२३ ज्या पीडा करणाऱ्यांनीं तुझ्या जिवाला
म्हटलें, खालीं वाक म्हणजे आम्ही तुजवरून चालून
जाऊं, आणि तुजवरून ज्या चालणाऱ्यांसाठीं तूं आपली
पाठ, भूमि व रस्ता अशी केली, त्यांच्या हातीं मी तो
प्याला देईन.

५२ १ हे सीयोने, जागी हो, आपल्या बलानें
युक्त हो; हे यरुशलेमे, पवित्र नगरी, आपलीं
सुंदर वस्त्रें परिधान कर, कारण यापुढें बेसुंती
किंवा अशुद्ध असा कोणी तुझ्या ठायीं प्रवेश करणार
नाहीं. २ अंगाची धूळ झाड; हे यरुशलेमे, उठून बैस;
सीयोनेच्या बंदिवान कन्ये, आपल्या गळ्याचीं बंधनें
सोडून टाक.

३ कारण परमेश्वर म्हणतो कीं मोलावांचून
तुम्हांस विकिलें, आणि पैक्यावांचून तुमची मुक्तता
होणार. ४ कारण प्रभु परमेश्वर म्हणतो कीं माझे
लोक मिसर देशांत जाऊन राहिले; अश्शूरानेंहि विना-
कारण त्यांच्यावर जुलूम केला. ५ परमेश्वर म्हणतो,
माझ्या लोकांस फुकट धरून नेलें आहे, आणि आतां

मी येथें काय करूं? परमेश्वर म्हणतो; त्यांजवर प्रभुत्व
करणारे गर्जना करीत आहेत, दिवसभर एकसारखी
माझ्या नामाची निंदा होत आहे; ६ म्हणून माझ्या
लोकांस माझ्या नामाची ओळख होईल, आणि मग
मी तुमच्याजवळ आहें असें बोलणारा तोच मी आहें
असें ते त्या दिवशीं जाणतील.
७ जो सुवार्ता सांगतो, शांतीची घोषणा करितो,
शुभवृत्त विदित करितो, तारण जाहीर करितो, तुझा
देव राज्य करीत आहे असें सीयोनास म्हणतो, त्याचे
पाय पर्वतांवरून येतांना किती मनोरम दिसतात.
८ तुझ्या जागल्यांचा हा शब्द ऐक; ते एकदम उच्च
स्वरानें गात आहेत; कारण परमेश्वर सीयोनास परत
येत आहे हें ते प्रत्यक्ष पाहत आहेत. ९ यरुशलेमाच्या
उध्वस्त झालेल्या स्थलांनो, आनंदघोष करा, सर्व मिळून
गा; कारण परमेश्वरानें आपल्या लोकांचें सांत्वन केलें
आहे, त्यानें यरुशलेमास उद्धरिलें आहे. १० परमे-
श्वरानें सर्व राष्ट्रांपुढें आपल्या पवित्र हाताची अस्तनी
मागें सारिली आहे; सगळ्या दिगंतांस आमच्या देवानें
केलेलें तारण दिसून येत आहे.
११ निघा, निघा, तेथून निघून जा; अशुद्ध वस्तूला शिवूं
नका; त्याच्यामधून निघून जा; परमेश्वराचीं पात्रें वाहणा-
ऱ्यांनो, तुम्ही आपणांस शुद्ध करा. १२ तुम्हांला घाईघाईनें
निघावें लागणार नाहीं, पळ काढावा लागणार नाहीं;
कारण परमेश्वर तुमचा पुढारी आहे; इस्राएलाचा
देव तुमचा पाठीराखा आहे.
१३ पाहा, माझा सेवक सुज्ञतेनें वर्तेल, तो थोर व
उन्नत होईल, तो अत्युच्च होईल. १४ ज्याप्रमाणें तुला
पाहून बहुत लोक चकित झाले (त्याचा चेहरा मनुष्यांच्या-
सारखा नव्हता, त्याचें स्वरूप मनुष्यजातीच्यासारखें
नव्हतें इतका तो विरूप होता,) १५ त्याप्रमाणें तो अनेक
राष्ट्रांस दचकावयास लावील; राजे त्याला पाहून
आपलीं तोंडें बंद करितील; कारण कोणीं सांगितल्या
नाहींत असल्या गोष्टी ते पाहतील; त्यांच्या कानीं
पडल्या नाहींत असल्या गोष्टी त्यांला कळतील.
५३ १ आम्हीं ऐकलेल्या वार्तेवर कोणीं विश्वास
ठेविला आहे? परमेश्वराचा भुज कोणास प्रगट
झाला आहे? २ कारण तो त्याजपुढें रोप्या-
सारखा, रुक्ष भूमींतील अंकुरासारखा वाढला; त्याला
रूप नव्हतें, त्याला शोभा नव्हती; त्याजकडे पाहिलें
तर त्याजवर मन बसेल असें त्याच्या ठायीं सौंदर्य
नव्हतें. ३ तुच्छ मानिलेला, मनुष्यांनीं टाकिलेला,
क्लेशांनीं व्यापिलेला व व्याधींशीं परिचित असलेला
असा तो पुरुष पाहून लोक तोंडें फिरवीत, व त्याला
तुच्छ लेखीत; आणि त्याला आम्हीं मानिलें नाहीं.
४ खरोखर आमचे व्याधि त्यानें आपल्यावर घेतले,
आमचे क्लेश त्यानें वाहिले; तरी त्यास ताडण केलेलें,
देवानें त्यावर प्रहार केलेलें, व त्याला पीडिलेलें असें
आम्हीं त्याला लेखिलें. ५ खरें पाहिलें असतां तो
आमच्या अपराधांमुळें घायाळ झाला, आमच्या दुष्कर्मां-
मुळें ठेचला गेला; आम्हांस शांति देणारी अशी शिक्षा
त्यास झाली; त्यास बसलेल्या फटक्यांनीं आम्हांस आरोग्य
प्राप्त झालें. ६ आम्ही सर्व मेंढरांप्रमाणें बहकून गेलों
होतों; आम्हीं प्रत्येकानें आपआपला मार्ग धरिला होता;
अशा आम्हां सर्वांचें पाप परमेश्वरानें त्याजवर लादिलें.
७ त्याचे हालहाल केले तरी ते त्यानें सोशिले,
आपलें तोंडसुद्धां उघडिलें नाहीं; वधावयास नेत
असलेल्या कोकराप्रमाणें, लोकर कातरणाऱ्यांपुढें गप्प
राहणाऱ्या मेंढराप्रमाणें, तो गप्प राहिला; त्यानें आपलें
तोंड उघडिलें नाहीं. ८ त्याजवर जुलूम करून व
खटला चालवून त्याला घेऊन गेले; जीवंतांच्या भूमींतून
त्याला काढून टाकिलें, आणि माझ्या लोकांच्या पातकां-
मुळें त्याला ताडण करण्यांत आलें; असा त्या पिढीच्या
लोकांपैकीं कोणीं तरी विचार केला काय? ९ त्याची
कबर दुर्जनांच्या कबरांमध्यें नेमिली होती आणि तो
मेल्यावर धनवंतांची कबर त्यास प्राप्त झाली; तथापि
त्यानें कांहीं अधर्म केला नव्हता, त्याच्या मुखांत कांहीं
कपट नव्हतें.
१० त्याला ठेचावें असें परमेश्वराच्या मर्जीस आलें;

१ **मुळांत:** आपला पवित्र भुज उघडा केला आहे;
२ **अथवा:** सिंचील;

त्यानें त्याला पीडिलें; त्याच्या जिवाचें दोषार्पण झाल्या-
वर तो संतति पाहील, तो दीर्घायु होईल, त्याच्या हातून
परमेश्वराचा मनोरथ सफळ होईल. ११ त्याच्या जिवाच्या
वेदना सरल्यावर तो त्यांचें फल पाहून समाधान
पावेल; तो माझा धर्मशील सेवक आपल्या ज्ञानानें
बहुतांस निर्दोष ठरवील; त्यांच्या अधर्माचा भार तो
आपल्यावर घेईल. १२ ह्यामुळें मी त्याला थोरांबरोबर
विभाग देईन, तो बलवानांबरोबर लूट वांटून घेईल;
कारण आपला प्राण वाहूं देऊन तो मृत्यु पावला, त्यानें
आपणास अपराध्यांत गणूं दिलें; त्यानें बहुतांचें पाप
आपल्यावर घेतलें व अपराध्यांसाठीं मध्यस्थी केली.

५४ १ मूल न झालेल्या वंध्ये, आनंदानें गजर
कर; ज्या तुला प्रसूतिवेदना माहीत नाहींत ती तूं
आनंदानें जयघोष कर, आनंदाची आरोळी मार;
कारण विवाहित स्त्रीच्या मुलांपेक्षां सोडलेलीचीं मुलें
पुष्कळ आहेत असें परमेश्वर म्हणतो. २ आपल्या डेऱ्यां-
ची जागा वाढीव, आपल्या राहुट्यांच्या कनाता पसरूं दे;
अटकाव करूं नको; आपल्या दोऱ्या लांब कर, मेखा पक्क्या
ठोक. ३ कारण उजवीकडे व डावीकडे तुझा विस्तार
होईल; तुझें संतान राष्ट्रांवर ताबा करील; व उजाड
झालेलीं नगरें वसवील.

४ भिऊं नको, तूं लज्जित होणार नाहींस; घाबरूं नको,
तूं फजीत होणार नाहींस; तुझ्या तारुण्यांतील अप्रतिष्ठेचा
तुला विसर पडेल; तुला आपल्या वैधव्याच्या बट्ट्याचें स्मरण
यापुढें होणार नाहीं. ५ कारण तुझा निर्माणकर्ता तुझा पति
आहे; सेनाधीश परमेश्वर हें त्याचें नाम; इस्राएलाचा पवित्र
प्रभु तुझा उद्धारकर्ता आहे; त्याला सर्व पृथ्वीचा देव
म्हणतात. ६ सोडिलेल्या व दुःखित मनाच्या स्त्रीप्रमाणें
तुला परमेश्वर बोलावीत आहे, तरुणपणीं टाकलेल्या
स्त्रीप्रमाणें तुला परमेश्वर बोलावीत आहे, असें तुझा
देव म्हणतो. ७ केवळ क्षणभर मीं तुला सोडिलें,
तरी मोठ्या करुणेनें मी तुला जवळ करीन. ८ रागाच्या
आवेशांत मीं आपलें तोंड तुजपासून क्षणभर लपविलें;
पण मी तुजवर दया करीन, तुजवर मी सर्वकाळ
प्रसन्न राहीन असें तुझा उद्धारकर्ता परमेश्वर म्हणतो.

९ नोहाच्या जलप्रलयाप्रमाणें हें मी लेखितों; नोहाचा
जलप्रलय भूमीवर पुनरपि येणार नाहीं अशी मीं शपथ
वाहिली होती त्याप्रमाणें तुजवर कोप करणार नाहीं,
तुला दटाविणार नाहीं अशी शपथ मीं वाहिली आहे.
१० कारण पर्वत दृष्टीआड होतील, टेकड्या ढळतील,
परंतु माझी तुजवरची दया ढळणार नाहीं; माझा
शांतीचा करार हालणार नाहीं, असें तुजवर करुणा
करणारा परमेश्वर म्हणतो.

११ अगे पीडलेल्ये, वादळांनीं त्रस्त झालेल्ये, सांत्वन
न पावलेल्ये, मी तुझे पाषाण सुरम्य प्रकारें बसवीन आणि
नीलमण्यांनीं तुझा पाया घालीन. १२ तुझ्या भिंती-
वरील कळस माणकांचे, तुझ्या वेशी लालांच्या, तुझ्या
भोवतालचा प्रदेश रत्नखचित करीन. १३ तुझीं
सर्व मुलें परमेश्वरापासून शिक्षण पावतील; तुझ्या
मुलांना मोठी शांति प्राप्त होईल. १४ धार्मिकतेनें
तूं खंबीर होसील, जाचापासून दूर राहशील, कां कीं
तुला भीतिच उरणार नाहीं; तूं धाकापासून दूर राह-
शील, तो तुजजवळ येणार नाहीं. १५ पाहा, तुजवर
गर्दी झाली ती मजकडून झाली नाहीं; तुझ्यावर कोण
गर्दी करितो ? जो करील तो तुजमुळें पडेल. १६ पाहा,
लोहार विस्तव फुंकून आपल्या कामाला पाहिजे तसें
हत्यार घडितो, त्याला मीं उत्पन्न केलें आहे; विध्वंस
करण्यासाठीं विध्वंसकहि मीं उत्पन्न केला आहे.
१७ तुझ्यावर चालविण्याकरितां घडिलेलें कोणतेंहि
हत्यार तुजवर चालणार नाहीं; तुजवर आरोप ठेव-
णाऱ्या सर्व जिव्हांना तूं दोषी ठरविशील. परमेश्वराच्या
सेवकांचें हेंच वतन आहे, हीच मजकडून मिळालेली
त्यांची धार्मिकता आहे, असें परमेश्वर म्हणतो.

५५ १ अहो तान्हेल्यांनो, तुम्ही सर्व जलाशया-
कडे या, जवळ पैका नसलेले तुम्ही या; सौदा
करा, खा; या, पैक्यावांचून व मोलावांचून
द्राक्षारसाचा व दुधाचा सौदा करा ! २ जें अन्न नव्हे
त्याकरितां दाम कां देतां ? ज्यानें तृप्ति होत नाहीं
त्यासाठीं श्रम कां करितां ? माझें लक्षपूर्वक ऐका,

१ अथवाः धर्मशील करील;

आणि उत्तम तें खा; तुमचा जीव पौष्टिक पदार्थांचें
सेवन करून संतुष्ट होवो. ३ कान द्या, मजकडे या;
ऐका, म्हणजे तुमचा जीव वांचेल; आणि मी तुम्हांबरो-
बर सर्वकाळचा करार करीन, म्हणजे दाविदाला देऊं
केलेले अढळ प्रसाद तुम्हांस देईन. ४ पाहा, मीं
त्यास राष्ट्रांचा साक्षी, राष्ट्रांचा नेता व शास्ता नेमिलें
आहे. ५ पाहा, तूं ओळखीत नाहींस अशा राष्ट्रांस तूं
बोलाविशील; ज्या राष्ट्राला तुझी ओळख नाहीं तें
तुजकडे धाव घेईल; ज्यानें तुला वैभवयुक्त केलें तो
परमेश्वर तुझा देव, इस्राएलाचा पवित्र प्रभु याच्यामुळें
असें होईल.

६ परमेश्वरप्राप्तीचा काळ आहे तोंवर त्याला
शोधा; तो जवळ आहे तोंच त्याचा धावा करा;
७ दुर्जन आपला मार्ग सोडो, अधर्मी आपल्या कल्पनां-
चा त्याग करो आणि परमेश्वराकडे वळो म्हणजे तो
त्याजवर दया करील; तो आमच्या देवाकडे वळो,
कारण तो त्याला भरपूर क्षमा करील. ८ कारण माझ्या
कल्पना तुमच्या कल्पना नव्हत; माझे मार्ग तुमचे मार्ग
नव्हत, असें परमेश्वर म्हणतो. ९ कारण आकाश जसें
पृथ्वीहून उंच आहे तसे माझे मार्ग तुमच्या मार्गांहून
आणि माझ्या कल्पना तुमच्या कल्पनांहून उंच
आहेत. १० पाहा, पाऊस व बर्फ हीं आकाशांतून
पडतात; आणि पृथ्वी भिजवून, तिला सफळ व हिरवी-
गार केल्यावांचून, पेरणाऱ्यास बीज, खाणाऱ्यास भाकरी
दिल्यावांचून तीं परत वर जात नाहींत; ११ त्याप्रमाणें
माझ्या मुखांतून निघणारें वचन होईल; तें माझी इच्छा
पूर्ण केल्यावांचून व ज्या कार्याकरितां मीं तें पाठविलें
तें केल्यावांचून मजकडे विफल होऊन परत येणार
नाहीं. १२ तसें तुम्ही आनंदानें निघाल, शांतीनें
मिरवत जाल; पर्वत व टेकड्या तुम्हांपुढें जयघोष
करितील; वनांतील सर्व वृक्ष टाळ्या वाजवितील.
१३ कांटेऱ्याच्या जागीं सरू उगवेल, रिंगणीच्या जागीं
मेंदी उगवेल; यावरून परमेश्वराचें नांव होईल; तें
सर्वकाळचें चिन्ह होईल, तें कधीं नष्ट होणार नाहीं.

५६
१ परमेश्वर म्हणतो, न्यायाचें पालन करा,
धर्माचरण करा; कारण माझें तारण जवळ
आलें आहे, माझें न्यायत्व प्रगट व्हावयास आलें
आहे. २ जो मानव हें करितो व जो मानवपुत्र यास
धरून राहतो, जो शब्बाथ पाळितो, कांहीं अपवित्र
करीत नाहीं, जो कोणतेंहि दुष्कर्म करण्यापासून
आपला हात आवरितो तो धन्य ! ३ जो विदेशी
परमेश्वरचरणीं जडला आहे तो असें न म्हणो कीं परमेश्वर
आपल्या लोकांतून माझा उच्छेद करील; आणि षंढहि
न म्हणो कीं मी केवळ शुष्क वृक्ष आहें. ४ कारण
परमेश्वर म्हणतो, जे षंढ माझे शब्बाथ पाळितात, मला
आवडणाऱ्या गोष्टी पसंत करितात व माझ्या करारास
दृढ धरून राहतात, ५ त्यांचें माझ्या गृहांत व माझ्या
कोटाच्या आंत कन्यापुत्रांहून श्रेष्ठ असें स्मारक मी स्थापीन
व त्यांचें नांव राखीन; सर्वकाळ राहील असें त्यांचें नांव
मी करीन, तें नाहींसें होणार नाहीं.

६ तसेंच परमेश्वराची सेवा करण्यासाठीं, त्याच्या नामाची
आवड धरण्यासाठीं व त्याचे सेवक होण्यासाठीं जे विदेशी
त्याच्या चरणीं जडले आहेत, त्यांतील जे कोणी शब्बाथ
अपवित्र न करावा म्हणून जपतात व माझा
करार दृढ धरून राहतात, ७ त्यांस मी आपल्या पवित्र
पर्वतावर आणीन आणि माझ्या प्रार्थनामंदिरांत त्यांस
हर्षित करीन; माझ्या वेदीवर केलेले त्यांचे
होम व यज्ञ मला पसंत होतील; कारण माझें मंदिर हें
सर्व राष्ट्रांसाठीं प्रार्थनामंदिर आहे असें म्हणतील.
८ घालवून दिलेल्या इस्राएलांस एकवट करणाऱ्या प्रभु
परमेश्वराचें हें वचन आहे कीं एकवटलेल्या इस्राएलां-
खेरीज इतरांसहि एकत्र करून त्यांच्यांत मिळवीन.

९ रानांतील सर्व पशूंनो, वनांतील सर्व पशूंनो, या,
खाऊन टाकावयास या. १० त्याचे जागल्ये अंधळे
आहेत, ते सगळे ज्ञानशून्य आहेत; ते सगळे मुके
कुत्रे आहेत, त्यांस भुंकतां येत नाहीं; ते बरळणारे,
पडून राहणारे, निद्राप्रिय असे आहेत. ११ ते अधाशी
कुत्रे आहेत; त्यांस तृप्ति कधी ती ठाऊक नाहीं; ते

मेंढपाळ ज्ञानशून्य आहेत; चोहोंकडून आपला स्वार्थ
साधण्यासाठीं ते एकंदर आपआपल्या मार्गास लागले
आहेत. १२ ते म्हणतात, चला, या, मी द्राक्षारस घेऊन
येतों; आपण मद्यानें मस्त होऊं; आजच्यासारखा
उद्यांचा दिवस होईल, तो पराकाष्ठेच्या चैनीचा होईल.

५७ १ धार्मिक नष्ट होतो पण तें कोणी मनास
आणीत नाहीं; देवभक्त प्राणांस मुकतात, पण
अरिष्टामुळें धार्मिक प्राणास मुकतो हा विचार
कोणी करीत नाहीं. २ तो शांति पावतो; सरळ मार्गानें
चालणारा प्रत्येक जण आपल्या बिछान्यावर शांत पडतो.
३ अहो चेटकिणीच्या मुलांनो, जाराच्या व जारिणी-
च्या वंशजांनो, तुम्ही इकडे जवळ या. ४ कोणाची
तुम्ही चेष्टा करितां? कोणाला तोंड विचकतां? कोणाला
जीभ काढून दाखवितां? तुम्ही अधर्माची संतति,
लबाडीचें बीज नाहीं काय? ५ प्रत्येक हिरव्या
झाडाखालीं, एला झाडांमध्यें तुम्ही मदोन्मत्त होतां,
ओढ्यांतल्या खडकाच्या कपारींत मुलांस ठार मारितां
तेच ना तुम्ही? ६ ओढ्यांतले गुळगुळीत गोटे हाच
तुझा वांटा; हाच तुझा भाग; त्यांसच तूं पेयार्पणें व
अन्नार्पणें वाहिलीं. असल्या गोष्टी होत असतां मला
समाधान वाटेल काय? ७ मोठ्या उंच पर्वतावर तूं
आपली खाट घातली, तेथेंच यज्ञ करावयास तूं वर
चढून गेलीस. ८ तूं आपलें स्मारकचिन्ह दरवाजांच्या
आड व खांबांच्या आड ठेविलें; मला सोडून दुसऱ्यापुढें
तूं आपली काया उघडी केली; चढून वर गेलीस; तूं
आपली खाट रुंद केली; तूं त्यांजशीं ठराव केला;
त्यांचा संग तुला आवडला; तूं शरीरपूजा केली. ९ तूं
तेलानें माखून राजाकडे गेलीस, पुष्कळ सुगंधी द्रव्यें
तूं चर्चिलीं, आपले जासूद दूरदूर पाठविले, अधो-
लोकापर्यंत तुझ्या नीचतेचा पल्ला गेला. १० दूरच्या
पल्ल्यामुळें तूं थकलीस, तरी आपण आतां हात टेकिले
असें तूं म्हणाली नाहींस; तुला नवा दम आला म्हणून
तुला ग्लानि आली नाहीं.
११ कोणाला घाबरून, कोणाला भिऊन तूं लबाडी
केली; माझें स्मरण ठेविलें नाहीं, परिणामाची पर्वा केली
नाहीं? मी दीर्घ काळ स्तब्ध राहिलों, म्हणूनच का तूं
माझें भय धरिलें नाहीं? १२ तुझी धार्मिकता मी
उजेडास आणीन; तुझ्या कर्माविषयीं म्हणशील तर
त्यांपासून तुला कांहींएक लाभ होणार नाहीं. १३ तूं
धावा करिशील तेव्हां तुझ्या मूर्तींच्या समुदायानें तुला
सोडवावें; त्या सगळ्यांस तर वारा उडवून नेईल, एक
फुंकर त्यांस घेऊन जाईल; पण जो माझा आश्रय करील
तो पृथ्वीचें वतन पावेल आणि माझ्या पवित्र पर्वताचा
ताबा घेईल. १४ अशी वाणी झाली कीं भरणी घाला,
भरणी घाला, मार्ग तयार करा; माझ्या लोकांच्या
मार्गावरून ठेच लागण्याजोगें असेल तें काढून टाका.
१५ कारण जो उच्च, परम थोर आहे, जो अक्षय
स्थितींत वास करतो, ज्याचें नाम पवित्र प्रभु आहे, तो
असें म्हणतो: मी उच्च व पवित्र स्थानीं बसतों, तसाच
ज्याचें चित्त अनुतापयुक्त व नम्र आहे त्याच्या ठायींहि
मी वसतों; येणेंकरून नम्रजनांच्या आत्म्याचें मी संजी-
वन करितों व अनुतापी जनांचें हृदय उत्तेजित करितों.
१६ कारण मी सतत वाद करणारा नव्हें, सदा कोप
करणारा नव्हें; असतों तर माझ्यापुढें मानवी आत्मा,
मीं उत्पन्न केलेले मानवी प्राणी गलित झाले असते.
१७ त्याच्या स्वार्थमूलक अधर्मामुळें मीं रागावून त्याला
ताडिलें, मी विन्मुख झालों, मी त्याजवर कोपलों; पण
तो आपल्या मनाच्या कलाप्रमाणें वागत गेला. १८ मीं
त्याची चालचर्या पाहिली, मी त्याला सुधारीन; मी त्याला
मार्ग दाखवीन, मी त्याचें, त्याच्यांतल्या शोकग्रस्तांचें
समाधान करीन. १९ मी त्याच्या तोंडून आभारवचन
उच्चारवीन, जे दूर आहेत व जे जवळ आहेत, त्यांस
शांति असो, शांति असो; मी त्यांस सुधारीन असें परमे-
श्वर म्हणतो. २० दुर्जन खवळलेल्या सागरासारखे
आहेत; त्यांच्यानें स्थिर राहवत नाहीं; त्यांच्या लाटा
चिखल व गाळ बाहेर टाकितात. २१ दुर्जनांस शांति
नाहीं असें माझा देव म्हणतो.

५८ १ कंठरव कर, कसर करूं नको; आपला
स्वर कर्ण्याप्रमाणें मोठा कर; माझ्या लोकांस
त्यांचे अपराध; याकोबाच्या घराण्यास त्यांची

पातकें विदित कर. २ ते तर रोजरोज मजकडे येतात,
माझे मार्ग ते जाणूं इच्छितात; धर्माचरण करणाऱ्या
व आपल्या देवाचें नियमशास्त्र न सोडणाऱ्या राष्ट्रा-
प्रमाणें ते मजजवळ रास्त निर्णय मागतात; देवाची
समीपता ते इच्छितात. ३ आम्ही उपास करितों ते तूं
कां पाहत नाहींस? आम्ही आपल्या जीवास पीडा
देतों ती तूं कां लक्षांत आणीत नाहींस? पाहा, आपल्या
उपासाच्या दिवशीं तुम्ही आपलें कामकाज चालवितां,
तुम्ही आपल्या सर्व मजुरांकडून काबाडकष्ट करवितां.
४ पाहा, तुमच्या उपासांचा परिणाम तर असा होतो
कीं तुम्ही त्या वेळीं कटकटी करितां व दुष्टपणानें
ठोसाठोसी करितां; तुमचा शब्द ऊर्ध्वलोकीं ऐकूं जावा
याकरितां तुमचे हल्लींचे उपास आहेत असें नाहीं.
५ मला पसंत पडणारा असा हा उपास आहे
काय? मनुष्याच्या जिवास पीडा व्हावी असा हा
तुमचा उपासाचा दिवस आहे काय? लव्हाळ्यासारखें
आपलें डोकें लवविणें आणि आपल्या अंगाखालीं गोण-
ताट व राख पसरणें याला उपास म्हणतोस काय?
आणि असा दिवस परमेश्वराला मान्य होईल काय?
६ दुष्टतेच्या बेड्या तोडाव्या, जुंवाच्या दोऱ्या सोडाव्या,
जाचलेल्यांस मुक्त करावें, सगळें जोखड मोडावें, हाच
मला पसंत असा उपास नव्हे काय? ७ तूं आपलें
अन्न भुकेल्यांस वांटावें; तूं लाचारांस व निराश्रितांस
आपल्या घरीं न्यावें; उघडा दृष्टीस पडल्यास त्यास
वस्त्र द्यावें; तूं आपल्या बांधवाला तोंड लपवूं नये हाच
तो उपास नव्हे का? ८ असें करिशील तर तुझा
प्रकाश प्रभातेप्रमाणें फाकेल, तुझी जखम लौकर
भरेल, तुझी धार्मिकता तुझ्यापुढें चालेल व
परमेश्वराचें गौरव तुझें पाठीराखें होईल. ९ तेव्हां तूं
हाक मारिशील ती परमेश्वर ऐकेल; तूं धावा करिशील
तेव्हां तो म्हणेल, हा मी आहें.

जर तूं आपल्यामधून जोखड लादण्याचें सोडून देशील,
बोट दाखविण्याचें व दुष्ट गोष्टी बोलण्याचें टाकून देशील;
१० जर तूं आपल्या जिवाला इष्ट तें भुकेल्यांस देशील,
दुःखग्रस्त जिवांस तृप्त करिशील, तर तुझा प्रकाश अंधकारांत
झळकेल, निबिड अंधकार तुला मध्यान्हाचें तेज असा
होईल, ११ परमेश्वर तुझा सततचा मार्गदर्शक होईल,
तो अवर्षणसमयीं तुझ्या जिवास तृप्त करील, तुझ्या
हाडांस मजबूत करील; तूं भरपूर पाणी दिलेल्या
मळ्याप्रमाणें होशील; पाणी कधीं न आटणाऱ्या झऱ्याप्रमाणें
होशील, १२ बहुत काळ मोडून पडलेलीं शहरें तुझे
लोक पुनः बांधितील; पूर्वीच्या पिढ्यांनीं घातलेले
पाये तूं पुनः उभारिशील; मोडतोडीचा जीर्णोद्धार
करणारा, वस्ती होण्यासाठीं रस्त्यांची दुरुस्ती करणारा,
असें तुझें नांव पडेल.

१३ तूं शब्बाथाची पायमल्ली करणार नाहींस, माझ्या
पवित्र दिवशीं आपला उद्योगधंदा करणार नाहींस, शब्बाथ
आनंददिन आहे, परमेश्वराचा पवित्र व सन्मान्य दिन आहे
असें म्हणून त्याचा आदर करिशील, व त्या दिवशीं
आपलें कामकाज करणार नाहींस, आपला धंदा चाल-
विणार नाहींस, वायफळ गोष्टी बोलत बसणार नाहींस;
१४ तर तूं परमेश्वराच्या ठायीं हर्ष पावशील; तूं
देशाच्या उच्च स्थलांचें जयोत्साहानें आक्रमण करिशील,
असें मी करीन; आणि तुझा पिता याकोब याच्या
वतनाचा तुला उपभोग घेऊं देईन; परमेश्वराच्या तोंडचे
हे शब्द आहेत.

## ५९

१ पाहा, उद्धार करवत नाहीं इतका परमे-
श्वराचा हात तोकडा झाला नाहीं; ऐकूं येत
नाहीं इतका त्याचा कान मंद झाला नाहीं. २ तर
तुमचे अपराध तुम्ही व तुमचा देव यांच्यामध्यें
आडभिंतीप्रमाणें झाले आहेत; तुमच्या पातकांमुळें तो
तुम्हांस दर्शन देत नाहीं, तुमचें ऐकत नाहीं. ३ कारण
तुमचे हात रक्तानें, तुमचीं बोटें अधर्मानें विटाळलीं
आहेत; तुमची वाणी असत्य आहे, तुमची जिव्हा
दुष्टतेचे शब्द पुटपुटते. ४ धर्मास अनुसरून दावा
करणारा कोणी नाहीं, आणि सत्यास स्मरून खटला
चालविणारा कोणी नाहीं; लोक पोकळ गोष्टींवर भिस्त
ठेवितात, कपटानें बोलतात; ते उपद्रवरूप गर्भ धारण
करितात आणि अनर्थाला जन्म देतात. ५ ते नागाचीं
अंडीं उबवितात, कातिणीचें जाळें विणितात; त्यांचीं

अंडीं खाणारा मरणारच; त्यांतलें एकादें चिरडिलें तर
त्यांतून फुरसें निघतें. ६ त्यांचीं जाळीं पांघरण्याच्या
उपयोगीं नाहींत; ह्या आपल्या वीणकामानें त्यांला
स्वतांस झाकतां येत नाहीं; त्यांचीं कामें केवळ उपद्रव-
जनक होत; त्यांच्या हातून बलात्काराचीं कामें होतात.
७ त्यांचे पाय दुष्कर्म करण्यास धावतात; निर्दोष रक्तपात
करण्यास त्वरा करितात; त्यांच्या कल्पना अधर्माच्या
असतात; त्यांच्या मार्गांत नाश व विध्वंस असतात.
८ शांतीचा मार्ग त्यांस ठाऊक नाहीं; त्यांच्या वाटांत
न्याय नाहीं; ते आपणांसाठीं वाकडे मार्ग करितात; त्या
मार्गांनीं चालणाऱ्या कोणासहि शांति ठाऊक नाहीं.

९ म्हणून न्याय आम्हांपासून दूर राहतो, दोषमुक्तता
आम्हांस प्राप्त होत नाहीं; आम्ही प्रकाशाची अपेक्षा
करितों तों अंधकार; उजेडाची आशा करितों तों
आम्ही काळोखांत चालूं लागतों. १० आम्ही अंधळ्यां-
सारखे भिंत चाचपतों, नेत्रहीनाप्रमाणें चाचपतों, संधि-
प्रकाशांत अडखळावें तसें मध्यान्हसमयीं अडखळतों;
धष्टपुष्टांमध्यें आम्ही मृतवत् आहों. ११ आम्ही सगळे
अस्वलांसारखें गुरगुरतों, पारव्यांसारखें घुमत राहतों;
आम्ही न्यायाची अपेक्षा करितों तों त्याचा पत्ता
नाहीं; तारणाची आशा धरितों तों तें आम्हांपासून दूर
राहतें; १२ कारण आमचे अपराध तुजसमोर बहुत
आहेत: आमचीं पातकें आम्हांविरुद्ध साक्ष देतात;
आमचे अपराध आम्ही जाणून आहों, आमचीं
दुष्कृत्यें आम्हांस ठाऊक आहेत. १३ धर्मच्युति, परमे-
श्वराचा अव्हेर, आमच्या देवास अनुसरण्यास माघार घेणें,
छलसूचक व असत्य भाषण करणें, लबाडी मनांत योजून
ती बोलून दाखविणें, हीं तीं आहेत. १४ न्यायाला मागें
ढकललें आहे, धार्मिकता लांब उभी राहिली आहे; कारण
चवाठ्यावर सत्य अडखळून पडलें आहे, तेथें सरळतेचा
प्रवेशच होत नाहीं. १५ सत्याचा अगदीं अभाव झाला
आहे; दुष्कर्मापासून दूर राहणारा बळी पडतो.

परमेश्वरानें हें पाहिलें व न्याय नाहीं म्हणून त्याची
इतराजी झाली. १६ कोणीच कर्ता पुरुष नाहीं हें
त्याला दिसून आलें, कोणी मध्यस्थ नाहीं म्हणून तो
विस्मित झाला, तेव्हां त्याच्याच बाहूनें त्याला साहाय्य
केलें, त्याच्या न्यायत्वानें त्याला आधार दिला. १७
त्यानें उरस्त्राणाप्रमाणें न्यायत्व धारण केलें व आपल्या
मस्तकीं तारणरूप शिरस्त्राण घातलें; सूडरूपी पेह-
राव तो ल्याला, आवेशरूप झग्यानें आपलें अंग
त्यानें झांकिलें. १८ ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें तो
प्रतिफळ देईल, म्हणजे आपल्या शत्रूंस संताप आणील,
आपल्या वैऱ्यांस शासन करील, द्वीपांचें उसनें फेडील.
१९ ते मावळतीपासून परमेश्वराच्या नामाचें भय बाळ-
गितील, सूर्याच्या उगवतीपासून त्याच्या प्रतापाचें भय
बाळगितील; कारण शत्रु पाण्याच्या लोंढ्यासारखा येईल
तेव्हां परमेश्वराचा आत्मा त्याजविरुद्ध झेंडा उभारील.
२० तो सीयोनाकडे आणि याकोबापैकीं जे अधर्मापासून
परावृत्त झाले त्यांजकडे उद्धारकर्ता म्हणून येईल, असें
परमेश्वर म्हणतो. २१ परमेश्वर म्हणतो, माझा तर
त्यांच्याशीं हाच करार: तुजवर असलेला माझा आत्मा,
तुझ्या मुखांत घातलेलीं माझीं वचनें, तुझ्या मुखांतून,
तुझ्या संतानाच्या मुखांतून व तुझ्या संतानाचें जें
संतान त्याच्या मुखांतून आतांपासून पुढें सर्वकाळ
निघून जावयाचीं नाहींत, असें परमेश्वर म्हणतो.

६० १ ऊठ, प्रकाशमान हो; कारण प्रकाश तुज-
कडे आला आहे; परमेश्वराचें तेज तुजवर
उदय पावलें आहे. २ पाहा, अंधकार पृथ्वीला
झाकीत आहे, निबिड काळोख राष्ट्रांस झाकीत आहे;
पण तुजवर परमेश्वर उदय पावत आहे, त्याचें तेज
तुजवर दिसत आहे. ३ राष्ट्रें तुझ्या प्रकाशाकडे येतील,
राजे तुझ्या उदयप्रभेकडे येतील.

४ तूं आपले डोळे वर करून चोहोंकडे पाहा; ते सर्व
एकत्र होत आहेत, तुजकडे येत आहेत; तुझे पुत्र दुरून
येत आहेत, तुझ्या कन्यांला कडेवर बसवून आणीत
आहेत. ५ हें पाहशील तेव्हां तुझ्या मुखावर आनंद
चमकेल, तुझ्या हृदयाला स्फुरण येऊन तें विकास पावेल,
कारण समुद्राकडून विपुल धन तुजकडे लोटेल,
राष्ट्रांची संपत्ति तुजकडे येईल. ६ उंटांच्या झुंडी,
मिद्यान व एफा एथील तरुण उंट तुला व्यापून टाकि-

तील; सर्व लोक सोनें व ऊद घेऊन शबा येथून येतील,
परमेश्वराचा आनंदभरानें गुणानुवाद करितील.
७ केदारचे सर्व कळप तुजजवळ एकवट होत आहेत;
नबायोथचे एडके तुझ्या कामीं येतील; ते मला पसंत
पडून माझ्या वेदीवर चढतील, आणि मी आपल्या
सुंदर मंदिराची शोभा वाढवीन. ८ जे मेघाप्रमाणें
धावत आहेत, कबुतरें आपल्या घरकुंड्यांकडे उडून
जातात तसे जे उडत आहेत ते कोण? ९ खरेंच, द्वीपें
माझी वाट पाहत आहेत; तुझा देव परमेश्वर याच्या
नामासाठीं, इस्राएलाच्या पवित्र प्रभूसाठीं तार्शीशचीं
गलबतें तुझ्या पुत्रांस त्यांच्या सोन्यारुप्यासहित
दुरून घेऊन प्रथम येत आहेत, कारण परमेश्वरानें
तुला वैभवयुक्त केलें आहे.

१० परदेशचे लोक तुझे कोट बांधीत आहेत, त्यांचे
राजे तुझी सेवा करीत आहेत; कारण मीं क्रोधाविष्ट होऊन
तुला ताडिलें तरी आतां मीं प्रसन्न होऊन तुजवर दया केली
आहे. ११ राष्ट्रांची संपत्ति तुजकडे आणावी, त्यांचे राजे
तुजकडे मिरवीत आणावे म्हणून तुझ्या वेशी सतत
उघड्या राहतील, त्या अहोरात्र बंद म्हणून राहणार
नाहींत. १२ कारण जें राष्ट्र व जें राज्य तुझी सेवा करणार
नाहीं तें विलयास जाईल; अशीं राष्ट्रें खातरीनें उद्ध्वस्त
होतील. १३ माझें पवित्रस्थान शोभिवंत व्हावें
म्हणून लबानोनाचें वैभव तुजकडे येईल; अर्थात् सुरू,
देवदारू, भद्रदारू हे एकंदर तुजकडे येतील; माझें
पादासन मी शोभायमान करीन. १४ तुला पीडा
करणाऱ्यांचीं मुलें तुजकडे नमत येतील, तुला तुच्छ
मानणारे सर्व तुझ्या चरणीं लोटांगण घालितील; तुला
परमेश्वराचें नगर इस्राएलाच्या पवित्र प्रभूचें सीयोन
म्हणतील.

१५ तूं टाकिलेली व द्वेषिलेली होतीस, तुझ्याकडे कोणी
जातयेत नसत; तरी तुला सर्वकाळचें भूषण, पिढ्यानपि-
ढ्यांचा आनंद अशी मी करीन. १६ तूं राष्ट्रांचें दूध शोषून
घेशील, राजांचे स्तन तूं चोखिशील, आणि मी परमेश्वर
तुझा तारणकर्ता, उद्धारकर्ता, याकोबाचा समर्थ प्रभु आहें हें
तूं जाणिशील. १७ मी तांब्याच्या जागीं सोनें, लोखंडाच्या
जागीं रुपें आणीन; लाकडांच्या जागीं तांबें व
दगडांच्या जागीं लोखंड आणीन; तुजवर शांति सत्ता
चालवील व न्याय तुझा कारभार पाहील, असें मी
करीन. १८ यापुढें तुझ्या देशांत कसलाहि
जुलूम अगर तुझ्या सीमांच्या आंत उजाडी
व नाश यांचें नांवहि ऐकूं येणार नाहीं; तारण माझा
कोट व कीर्ति माझी वेस आहे असें तूं म्हणशील.
१९ यापुढें दिवसां प्रकाश देण्यास तुला सूर्याची,
चांदण्यासाठीं तुला चंद्राची गरज लागणार नाहीं, कारण
परमेश्वर तुझा सार्वकालिक दीप होईल, तुझा देव
तुझें तेज होईल. २० तुझ्या सूर्याचा यापुढें अस्त
होणार नाहीं; तुझा चंद्र निस्तेज होणार नाहीं, कारण
परमेश्वर तुझा सार्वकालिक दीप होईल; तुझे शोकाचे
दिवस संपले आहेत, २१ तुझे सर्व लोक धार्मिक
होतील, ते भूमीचें वतन सर्वकाळ भोगितील; माझें
गौरव व्हावें म्हणून ते माझे लाविलेले रोप होतील,
ते माझ्या हातची कारागिरी होतील. २२ जो सर्वांत
लहान त्याचे सहस्र होतील, जो क्षुद्र त्याचें बलाढ्य राष्ट्र
होईल; मी परमेश्वर हें योग्य समयीं त्वरित घडवून आणीन.

## ६१

१ प्रभु परमेश्वराचा आत्मा मजवर आला
आहे; कारण दीनांस शुभवृत्त सांगण्यास
परमेश्वरानें मला अभिषेक केला आहे; भग्न-
हृदयी जनांस पट्टी बांधावी, धरून नेलेल्यांस मुक्तता,
व बंदिवानांस बंधमोचन विदित करावें; २ परमेश्वराच्या
प्रसादाचें वर्ष, व आमच्या देवाच्या सूड घेण्याचा दिवस
विदित करावा; सर्व शोकग्रस्तांचें सांत्वन करावें;
३ सीयोनांतील शोकग्रस्तांस राखेच्या ऐवजीं शिरोभूषण
घालावें, त्यांस शोकाच्या ऐवजीं हर्षरूप तेल द्यावें,
खिन्न आत्म्याच्या ऐवजीं प्रशंसारूप वस्त्र द्यावें; तें अर्थात्
अशासाठीं कीं परमेश्वराच्या गौरवार्थ त्यांस धार्मिकतेचे
वृक्ष, परमेश्वरानें लाविलेले रोप म्हणतां यावें म्हणून
त्यानें मला पाठविलें आहे.

४ ते पुरातन काळची मोडतोड बांधून
काढितील, आपल्या वाडवडिलांच्या वेळचीं खिंडारें
भरून काढितील, उजाड नगरें व पूर्वीच्या पिढ्यांचीं

ओसाड स्थळें पुनः वसवितील. ५ परके उभे
राहून तुमचे कळप चारितील, परदेशी तुमचे
रानांचे व द्राक्षांचे मळे लावणारे होतील. ६ तुम्हांस
तर परमेश्वराचे याजक असें नांव पडेल, लोक तुम्हांस
आमच्या देवाचे सेवक म्हणतील; राष्ट्रांची संपत्ति
तुम्ही भोगाल, त्यांचें वैभव तुम्हांस प्राप्त झाल्याचा
अभिमान वाहाल. ७ तुमच्या अप्रतिष्ठेच्या मोबदला
तुम्हांस दुप्पट मिळेल; आपल्या उपमर्दाबद्दल मिळा-
लेल्या वतनभागानेंच ते आनंद पावतील; असे ते
आपल्या देशांत दुप्पट वतन पावतील; त्यांस सार्व-
कालिक आनंद प्राप्त होईल. ८ कारण मला, परमेश्वराला,
न्याय प्रिय आहे, अन्यायाच्या लुटीचा मला वीट
आहे; मी त्यांला खात्रीनें प्रतिफळ देईन; त्यांच्याशीं
सार्वकालिक करार करीन. ९ अन्य राष्ट्रांत त्यांचा
वंश, देशोदेशींच्या लोकांत त्यांची संतति प्रख्यात
होईल; परमेश्वरानें आशीर्वाद दिलेली ती ही असें
त्यांस पाहणारे कबूल करितील.

१० मी परमेश्वराच्या ठायीं अत्यंत हर्ष पावतों,
माझ्या देवाच्या ठायीं माझा जीव उल्लासतो; कारण जसा
नवरा शेलापागोटें लेऊन स्वतःला याजकासारखा मंडित
करितो व नवरी जशी अलंकारांनीं स्वतांला भूषित करिते,
तशीं त्यानें मला तारणाचीं वस्त्रें नेसविलीं आहेत; मला
धार्मिकतेच्या झग्यानें आच्छादिलें आहे. ११ कारण भूमि
जशी आपले अंकुर उगवविते, मळा जसा आपणांत
पेरलेलें बीज उगवेसें करितो, तसा प्रभु परमेश्वर सर्व
राष्ट्रांदेखत धार्मिकता व कीर्ति अंकुरित करील.

६२ १ सीयोनाची धार्मिकता उदयप्रभेप्रमाणें
फाके तोंवर तिच्याकरितां मी मौन धरणार नाहीं,
यरुशलेमाचें तारण पेटलेल्या मशालीप्रमाणें दिसे
तोंवर तिच्याकरितां मला चैन पडणार नाहीं. २ राष्ट्रें
तुझी धार्मिकता पाहतील, सर्व राजे तुझें वैभव पाहतील;
परमेश्वराच्या मुखानें ठेविलेल्या नव्या नांवानें तुला
हाक मारितील. ३ तूं परमेश्वराच्या हातीं शोभायमान
मुकुट, आपल्या देवाच्या हातीं राजकिरीट होशील.
४ यापुढें तुला सोडिलेली म्हणणार नाहींत, यापुढें
तुझ्या भूमीला वैराण म्हणणार नाहींत; तर तुला हेफ्सी-
सीबा (ती माझा आनंद) व तुझ्या भूमीला बऊल
(विवाहित) म्हणतील; कारण तूं परमेश्वराला आनंद
देणारी आहेस, तुझी भूमि सधवा होईल. ५ कारण तरुण
जसा कुमारीशीं विवाह करितो, तशीं तुझीं मुलें तुजशीं
विवाह करितील, नवरा जसा नवरी पाहून हर्षतो तसा
तुझा देव तुला पाहून हर्षेल.

६ हे यरुशलेमा, मीं तुझ्या कोटांवर पहारेकरी
नेमिले आहेत; ते रात्रंदिवस उगे राहत नाहींत; अहो
परमेश्वराला स्मरण देणाऱ्यांनो, तुम्ही विसंवूं नका;
७ आणि तो यरुशलेम सुस्थित करून तें पृथ्वीला प्रशंसा-
विषय करी तोंवर त्याला चैन पडूं देऊं नका. ८ परमेश्वरानें
आपल्या उजव्या हाताची, बलवान् भुजेची शपथ
वाहिली आहे कीं यापुढें तुझें धान्य तुझ्या शत्रूंस मी
खात्रीनें खाऊं देणार नाहीं; तूं ज्यासाठीं श्रम केलेस तो
तुझा द्राक्षारस परके प्राशन करणार नाहींत; ९ तर
ज्यांनीं तें धान्य कोठारांत सांठविलें तेंच ते खातील व
परमेश्वराचें स्तवन करितील; ज्यांनीं तो द्राक्षारस सांठ-
विला तेच माझ्या पवित्र मंदिराच्या अंगणांत तो पितील.

१० बाहेर पडा, वेशींतून बाहेर पडा; लोकांचे
मार्ग नीट करा; राजमार्गाला भर घाला, घाला भर;
धोंडे काढून टाका; अन्य राष्ट्रांसाठीं ध्वजा उभारा.
११ पाहा, परमेश्वरानें दिगंतापर्यंत हें वर्तमान गाज-
विलें आहे कीं सीयोनाच्या कन्येला म्हणा, पाहा, तुझें
तारण येत आहे; पाहा, वेतन त्याजपाशीं आहे व
पारिपत्य त्याजसमोर आहे. १२ पवित्र लोक, परमे-
श्वरानें उद्धरलेले लोक असें त्यांस म्हणतील, व तूं निगा
केलेली व न टाकिलेली नगरी आहेस असें म्हणतील.

६३ १ अदोमाहून येत आहे हा कोण? लाल-
भडक वस्त्रें लेऊन बस्राहून येत आहे हा कोण?
आपल्या वस्त्राभरणांनीं भूषित होऊन, आपल्या
पराक्रमाच्या आढ्यतेनें डुलत येत आहे हा कोण?
जो धर्मानें बोलणारा, जो तारण करण्यास समर्थ
तो मी आहें. २ तुझा पोषाखाला लाली कोठून?
तुझीं वस्त्रें द्राक्षकुंड तुडविणाऱ्याच्यासारखीं कां? ३ मी

एकट्यानेंच द्राक्षकुंड तुडविलें; मजबरोबर अन्य राष्ट्रां-
तला कोणी नव्हता; मीं त्यांस आपल्या क्रोधानें तुडविलें,
मीं त्यांस आपल्या संतापानें रगडिलें; त्यांचें रक्त
माझ्या वस्त्रांवर उडालें; माझ्या सर्व वस्त्रांवर डाग
पडले आहेत. ४ कारण सूड घेण्याचा दिवस मीं
आपल्या मनांत योजिला होता, माझ्या उद्धारकार्याचें
वर्ष आलें आहे. ५ मीं पाहिलें तों कोणी साहाय्यकर्ता
नव्हता; कोणाची अनुकूलता नव्हती म्हणून मी
विस्मित झालों; तेव्हां माझ्याच बाहूनें मला साहाय्य
केलें व माझ्या संतापानें मला आधार दिला. ६ मीं
आपल्या क्रोधानें राष्ट्रांस तुडविलें; मीं त्यांस आपल्या
संतापरूप मद्यानें बेहोश केलें व त्यांचें रक्त भूमीवर
वाहविलें.

७ परमेश्वरानें आम्हांवर जे सर्व उपकार केले
आणि आपल्या दयेनें व आपल्या विपुल करुणेनें
इस्राएलाच्या घराण्याचें जें फार कल्याण केलें, त्यांस
अनुरूप असें परमेश्वराच्या सदय कृत्यांचें मी वर्णन
करीन, त्याचे गुणानुवाद गाईन. ८ कारण तो म्हणाला,
खरोखर हे माझे लोक आहेत, कधीं लबाडी न कर-
णारीं अशीं हीं मुलें आहेत, म्हणून तो त्यांचा त्राता
झाला. ९ त्यांच्या सर्व दुःखानें तो दुःखी झाला,
त्याची प्रत्यक्षता दर्शविणाऱ्या दिव्यदूतानें त्यांचें तारण
केलें; त्यानें आपल्या प्रीतीनें व आपल्या करुणेनें त्यांस
उद्धरिलें; पूर्वीचे सर्व दिवस त्यानें त्यांचें लालनपालन केलें.

१० तरी त्यांनीं बंड केलें व त्याच्या पवित्र
आत्म्यास खिन्न केलें; तेव्हां तो उलटला व त्यांचा
शत्रु बनला, तो स्वतः त्यांजशीं लढला. ११ मग
त्याच्या लोकांस मोशाच्या वेळचे प्राचीन दिवस आठ-
वले; ते म्हणाले, ज्यानें त्यास त्यांच्या कळपांच्या
मेंढपाळांसह समुद्रांतून बाहेर आणिलें तो कोठें आहे?
ज्यानें आपला पवित्रतेचा आत्मा त्यांच्यांत घातला तो
कोठें आहे? १२ ज्यानें आपला प्रतापी भुज मोशाच्या
उजव्या बाजूनें चालविला, आपलें नाम सर्वकाळ राहावें
म्हणून ज्यानें त्यांच्यापुढें समुद्र दुभागला, १३ मैदानां-
तून घोडा नेतात तसें त्यांस समुद्रडोहांतून अडखळूं
न देतां ज्यानें नेलें, तो कोठें आहे? १४ खोऱ्यांत
उतरणाऱ्या गुरांप्रमाणें परमेश्वराच्या आत्म्यानें त्यांस
विश्रांतीस आणिलें; या प्रकारें आपलें नाम प्रतापी
व्हावें म्हणून तूं आपल्या लोकांस नेलें.

१५ तूं स्वर्गांतून अवलोकन कर, आपल्या पवित्रतेच्या
व प्रतापाच्या निवासस्थानांतून पाहा; तुझी आस्था व तुझें
पराक्रमदर्शन कोठें आहे? तुझ्या पोटांतला कळवळा व
तुझी करुणा माझ्या बाबतींत संकुचित झाली आहे. १६
तरी तूं आमचा पिता आहेस; अब्राहाम आम्हांस जाणत
नाहीं; इस्राएल आम्हांस ओळखीत नाहीं, तरी हे परमे-
श्वरा, तूं आमचा पिता आहेस; आमचा त्राता, हें तुझें
प्राचीन काळापासून नाम आहे. १७ हे परमेश्वरा,
आम्हांस तुझ्या मार्गापासून कां बहकूं देतोस? आम्हीं
तुझें भय बाळगूं नये इतकीं आमचीं मनें कठोर कां
करितोस? तुझे सेवक, तुझें वतन झालेले वंश यांज-
करितां परत ये. १८ तुझ्या पवित्र लोकांनीं केवळ
थोडा काळ वतन भोगिलें; आमच्या शत्रूंनीं तुझें पवित्र-
स्थान तुडवून टाकिलें आहे. १९ ज्यांवर तूं कधीं राज्य
केलें नाहीं, ज्यांस तुझें नाम दिलें नाहीं त्यांच्यासारखे
आम्ही झालों आहों.

६४ १ अहाहा! तूं आकाश विदारून उतरतास,
तुझ्या दर्शनानें पर्वत कंपायमान झाले असते, तर बरें
होतें! २ अग्नि जसा काट्याकुट्या जाळितो व पाणी
उकळवितो तसा तूं आपल्या शत्रूंस आपलें नाम प्रकट
करण्यासाठीं उतरला असतास; ३ तूं अनपेक्षित
भयप्रद कृत्यें करीत असतां तुझ्या दर्शनानें राष्ट्रें थर-
थर कांपलीं असतीं तर बरें होतें! ४ हे देवा, तुझी
आशा धरून राहणाऱ्यांचें इष्ट काम करणारा असा तुझ्या-
शिवाय दुसरा कोणी प्राचीन काळापासून ऐकण्यांत
आलेला नाहीं, त्याचें नाव आलेलें नाहीं, कोणीं तो
डोळ्यांनीं पाहिला नाहीं. ५ जो आवडीनें धर्माचरण
करितो त्याला, जे तुझ्या मार्गानें चालतांना तुझें स्मरण
करितात त्यांना, तूं भेट देतोस; पाहा, तूं आम्हांवर कोप-
लास, कारण आम्ही पापी ठरलों; ह्या स्थितींत आम्ही बहुत
काळ आहों; तर आमचा उद्धार होईल काय? ६ आम्ही

सगळे अशुद्ध मनुष्यासारखें झालों आहों; आमचीं सर्व
धर्मकृत्यें घाणेरड्या वस्त्रासारखीं झालीं आहेत; आम्ही सर्व
पाल्याप्रमाणें वाळून गेलों आहों; आमच्या अधर्मानें
आम्हांस वादळाप्रमाणें उडवून दिलें आहे. ७ तुझा धावा
करणारा कोणी नाहीं; तुझा आश्रय करण्यासाठीं कोणी
स्वतांला जागृत करीत नाहीं; कारण तूं आपलें मुख
आम्हांपासून लपविलें आहे; आमच्या अधर्माच्या
योगानेंच तूं आम्हांस भस्म केलें आहे.

८ तर आतां, हे परमेश्वरा, तूं आमचा पिता आहेस;
आम्ही माती आहों, तूं आमचा कुंभार आहेस; आम्ही सर्व
तुझ्या हातची कृति आहों. ९ हे परमेश्वरा, फार कोपूं नको,
आमचा अधर्म सदा स्मरूं नको; पाहा, दृष्टि लाव, आम्ही
तुला विनवितों, आम्ही सर्व तुझी प्रजा आहों. १० तुझीं
पवित्र नगरें वनें बनलीं आहेत; सीयोन रान बनलें
आहे; यरुशलेम ओसाड झालें आहे. ११ आमचे
पूर्वज ज्या आमच्या पवित्र व सुशोभित मंदिरांत
तुझें स्तवीत तें अग्नीनें भस्म झालें आहे, आणि
आमच्या सगळ्या मनोरम वस्तु नष्ट झाल्या आहेत.
१२ हे परमेश्वरा, हें पाहून तूं आपणाला आवरिशील
काय? तूं स्तब्ध राहून आम्हांला अशा दुर्धर पीडेंत
राहूं देशील काय?

६५ १ जे मला विचारीत नसत त्यांस मी
दर्शन दिलें; माझा धावा करीत नसत त्यांस मी
प्राप्त झालों; ज्यांस माझें नाम प्राप्त झालेलें नव्हतें
त्यांस मी म्हणालों, पाहा मी आहें, हा मी आहें. २ जो
चांगला नाहीं अशा मार्गानें स्वच्छंदपणें चालणाऱ्या
फितुरी लोकांपुढें मी आपले हात नित्य पसरले; ३ माझ्या-
समक्ष बागांत यज्ञ करून व विटांवर धूप जाळून मला
क्षोभ आणणारे असे हे लोक आहेत; ४ ते कबरांमध्यें
राहतात, गुप्त स्थानीं रात्र काढितात; डुकराचें मांस
खातात, अमंगळ पदार्थांचा रस त्यांच्या पात्रांत
असतो; ५ ते म्हणतात, हां! जवळ येऊं नको;
तुजहून मी पवित्र आहें; हे माझ्या नाकांत धुरासारखे,
सतत पेटलेल्या अग्नीसारखे आहेत. ६ पाहा, माझ्या-
समोर हा लेख आहे; मी पारिपत्य करीपर्यंत उगा
राहणार नाहीं, प्रतिफळ त्यांच्या पदरीं मोजून घालीन;
७ तुमच्या दुष्कर्मांचें आणि तुमच्या वाडवडिलांनीं पर्वतां-
वर धूप जाळिला व टेकड्यांवर माझा अपमान केला
त्यांच्या दुष्कर्मांचें फळ मी त्यांस देईन असें परमेश्वर
म्हणतो; मी आधीं त्यांच्या कर्मांचें फळ त्यांच्या पदरीं
मोजून घालीन.

८ परमेश्वर असें म्हणतो, द्राक्षांच्या घोसांत नवा
द्राक्षारस दृष्टीस पडला असतां त्यांत लाभ आहे म्हणून
याचा नाश करूं नका असें लोक म्हणतात; त्याप्रमाणें
मी आपल्या सेवकांस्तव करीन; मी अवघ्यांचा नाश
करणार नाहीं. ९ मी याकोबांतून संतान, यहूदांतून
माझ्या पर्वतांचा वारस उत्पन्न करीन; माझे निवडलेले
त्याचें वतन पावतील, माझे सेवक तेथें वस्ती करि-
तील. १० माझा धावा करणाऱ्या लोकांसाठीं शारोन
कळप चारण्याचें कुरण होईल, अखोराचें खोरें गुरांचा
गोठा होईल; ११ पण तुम्ही परमेश्वरास सोडिलें; जे
तुम्ही माझ्या पवित्र पर्वताची पर्वा करीत नाहीं,
गादासाठीं (भाग्यदेवतेसाठीं) मेजवानी तयार
करितां, मनीसाठीं (कर्मदेवतेसाठीं) मिश्रित पेयांचे
प्याले भरून ठेवितां, १२ त्या तुम्हांस मीं तरवार
नेमिली आहे; तुम्ही सगळे वधासाठीं खालीं वाकाल;
कारण मी हाक मारिली तरी तुम्हीं उत्तर दिलें नाहीं;
मी बोललों तरी तुम्हीं ऐकलें नाहीं; माझ्या दृष्टीनें जें
वाईट तें तुम्हीं केलें, जें मला नापसंत तें तुम्हीं
पसंत केलें.

१३ याकरितां प्रभु परमेश्वर म्हणतो, पाहा, माझे
सेवक खातील, पण तुम्ही उपाशीं राहाल; माझे सेवक
पितील, पण तुम्ही तान्हेले राहाल; पाहा, माझे सेवक
आनंद करितील पण तुम्ही फजीत व्हाल; १४ पाहा,
माझे सेवक हर्षित चित्तानें जयजयकार करितील, पण
तुम्ही खिन्न चित्तानें ओरडाल, भग्नहृदय होऊन आकांत
कराल. १५ तुम्ही आपलें नांव मागें ठेवाल त्याचा उप-
योग माझे निवडलेले लोक शाप देण्याकडे करून म्हणतील
कीं प्रभु परमेश्वर तुला जिवें मारील; तो आपल्या सेवकांस
दुसरें नांव ठेवील; १६ म्हणून देशांतला जो आपणास

धन्य म्हणवील तो सत्यदेवाच्या नामानें आपणास
तसा म्हणवील; देशांतला जो शपथ वाहील तो ती
सत्यदेवाच्या नामाची वाहील; कारण पूर्वीच्या कष्टांचा
विसर पडला आहे व ते माझ्या दृष्टीआड झाले आहेत.
१७ पाहा, मी नवें आकाश व नवी पृथ्वी निर्माण
करितों; पूर्वीच्या गोष्टी कोणी स्मरणार नाहींत, त्या
कोणाच्या ध्यानांत येणार नाहींत; १८ परंतु जें मी
उत्पन्न करितों त्यानें तुम्ही सदा आनंदी व्हा व उल्लास
पावा; पाहा, मी यरुशलेम उल्लासमय, त्याचे लोक आनंद-
मय करितों. १९ मी यरुशलेमाविषयीं उल्लास पावेन,
माझ्या लोकांविषयीं आनंद पावेन; त्यांत शोकाचा व
आकांताचा शब्द पुन: ऐकूं येणार नाहीं. २० यापुढें
थोडे दिवस वांचणारें अर्भक त्यांत जन्मास येणार नाहीं.
जो पुऱ्या आयुष्याचा होणार नाहीं असा म्हातारा त्यांत
असणार नाहीं; तेथील जो कोणी तरुणपणीं मरेल तो
शंभर वर्षांचा होऊन मरेल, देवाच्या शापानें मरणारा
पापीहि शंभर वर्षांचा होऊन मरेल. २१ ते घरें बांधून
त्यांत राहतील, द्राक्षांचे मळे लावून त्यांचें फळ खातील.
२२ ते घरें बांधतील आणि त्यांत दुसरे राहतील, ते
लावणी करितील आणि फळ दुसरे खातील, असें
व्हावयाचें नाहीं; कारण वृक्षाच्या आयुष्याप्रमाणें माझ्या
लोकांचें आयुष्य होईल, व माझे निवडलेले आपल्या
हातांच्या श्रमाचें फळ पूर्णपणें भोगितील. २३ त्यांचे
परिश्रम व्यर्थ जाणार नाहींत, संकट तत्काळ गांठील
अशा संततीला ते जन्म देणार नाहींत; कारण परमेश्वरानें
आशीर्वाद दिलेली ती संतति आहे, व त्यांचीं मुलें
त्यांजवळ राहतील. २४ त्यांनीं हाक मारण्यापूर्वीं मी
उत्तर देईन, ते बोलत आहेत तोंच मी त्यांचें ऐकेन,
असें होईल. २५ तेव्हां लांडगा व कोकरूं एकत्र चरतील,
सिंह बैलाप्रमाणें कडबा खाईल, सर्पाचें खाणें धूळ होईल;
माझ्या सगळ्या पवित्र डोंगरावर तीं उपद्रव देणार
नाहींत, नासधूस करणार नाहींत, असें परमेश्वर म्हणतो.

६६ १ परमेश्वर म्हणतो, आकाश माझें सिंहासन
व पृथ्वी माझें पादासन आहे; तुम्ही मजसाठीं
कशा प्रकारचें घर बांधणार ? मला विश्रांती-
साठीं कोणतें स्थल असणार ? २ परमेश्वर म्हणतो, त्या
सर्व वस्तु माझ्याच हातानें बनलेल्या आहेत; त्या अशा
प्रकारें झाल्या आहेत; पण जो दीन व भग्नहृदय आहे
व माझीं वचनें ऐकून कंपायमान होतो, त्याजकडे मी
पाहतों. ३ बैल कापतो तो मनुष्यवध करणारा होय;
मेंढ्याचा यज्ञ करितो तो कुत्र्याची मान मोडणारा होय;
अन्नार्पण करितो तो डुकराचें रक्त अर्पिणारा होय; धूप
दाखवितो तो मूर्तीचा धन्यवाद करणारा होय; ज्या अर्थी
त्यांनीं आपलेच मार्ग पसंत केले आहेत व अमंगळ
पदार्थांनीं त्यांचा जीव संतुष्ट होतो, ४ त्या अर्थी मी
त्यांच्यासाठीं दुर्दशा पसंत करीन, ज्याची त्यांस भीति
वाटते तें त्यांजवर आणीन; कारण मीं हाक मारिली
तेव्हां कोणीं उत्तर दिलें नाहीं, मी बोललों तेव्हां त्यांनी
माझें ऐकलें नाहीं, तर माझ्या दृष्टीनें जें वाईट तें त्यांनीं
केलें, मला जें नापसंत तें त्यांनीं पसंत केलें.

५ परमेश्वराचें वचन ऐकून कंपायमान होणाऱ्यांनो,
त्याचें वचन ऐका; तुमचा द्वेष करणारे तुमचे जे बंधु
माझ्या नामाचें निमित्त करून तुम्हांस हाकून देतात व
म्हणतात कीं परमेश्वराचें गौरव होवो म्हणजे तुमचा
हर्ष आम्हांस पाहण्यास सांपडेल, ते फजीत होतील.
६ नगरांतून कोलाहल ऐकूं येतो; मंदिरांतून शब्द
ऐकूं येतो; आपल्या शत्रूंचें पारिपत्य करणाऱ्या परमे-
श्वराचा शब्द ऐकूं येतो. ७ वेणा येण्यापूर्वीच ती प्रसूत
झाली, वेदना होण्यापूर्वीच तिला पुत्र झाला. ८ अशी
गोष्ट कोणीं कधीं ऐकली काय ? अशी गोष्ट कोणीं
पाहिली काय ? देश एका दिवसांत जन्म पावतो काय ?
राष्ट्र एका क्षणांत जन्मास येतें काय ? परंतु सीयोनेनें
वेणा दिल्या, ती आपलीं मुलें प्रसवली. ९ मुलें
जन्माच्या लागास आणून त्यांस मी प्रसविणार नाहीं
काय, असें परमेश्वर म्हणतो. जो मी जन्मास
घालणारा तो काय गर्भाशय बंद करणार, असें तुझा
देव म्हणतो.

१० यरुशलेमेबरोबर आनंद करा, तिजवर प्रेम
करणारे तुम्ही सर्व तिजमुळें उल्लासा; तिजसाठीं शोक
करणारे तुम्ही सर्व तिजबरोबर अत्यंत हर्षित व्हा;

११ म्हणजे तुम्ही तिचे स्तन चोखून तृप्त व्हाल,
सांत्वन पावाल व तिचें विपुल वैभव भोगून संतुष्ट
व्हाल. १२ कारण परमेश्वर म्हणतो, पाहा, नदीप्रमाणें
शांति व पाण्याच्या पुराप्रमाणें राष्ट्रांचें वैभव मी तिज-
कडे वाहवितों; तुम्ही स्तनपान कराल; तुम्हांस कडेवर
वागवितील, मांडीवर खेळवितील. १३ आई
मनुष्याचें सांत्वन करिते तसें मी तुमचें सांत्वन
करीन; यरुशलेमांत तुमचें सांत्वन करीन. १४ तें
पाहून तुमचें हृदय आनंदित होईल, कोवळ्या हिरवळी-
प्रमाणें तुमचीं हाडें तरतरीत होतील; परमेश्वराचा
हात त्याच्या सेवकांच्या ठायीं प्रगट होईल आणि
त्याचा क्रोध शत्रूंवर होईल.

१५ कारण पाहा, आपला क्रोध अग्नीच्या द्वारें प्रगट
करावा, आपल्या धमकीबरोबर ज्वाला निघाव्या म्हणून
परमेश्वर अग्नींतून येईल, त्याचे रथ वावटळीसमान अस-
णार. १६ कारण परमेश्वर अग्नीनें न्याय करील, सर्व
मनुष्यजातीचा आपल्या तरवारीनें न्याय करील; परमे-
श्वरानें वधिलेल्यांची संख्या मोठी असणार. १७ बागेच्या
मध्यभागीं असलेल्या मूर्तीच्या मागें लागावें म्हणून जे
आपणांस पवित्र व शुद्ध करितात व डुकराचें मांस, अमंगळ
पदार्थ व उंदीर खातात ते सगळे एकदम विलयास
जातील असें परमेश्वर म्हणतो.

१८ मी त्यांचीं कृत्यें व त्यांचे विचार जाणतों; सर्व
राष्ट्रांनी व भिन्नभिन्न भाषा बोलणाऱ्यांनीं माझें वैभव
पाहावें म्हणून मीं त्यांस एकवट करावें अशी वेळ आली
आहे. १९ मी त्यांना एक चिन्ह दाखवीन; त्यांतून
जे बचावतील त्यांस मी तार्शीश, पूल व लूद अशा धनुर्धारी
राष्ट्रांकडे पाठवीन; ज्यांनीं माझें नाम ऐकलें नाहीं, माझा
महिमा पाहिला नाहीं अशा तूबल व यवान या दूरच्या द्वीपांत
मी त्यांस पाठवीन; ते अन्य राष्ट्रांत माझा महिमा प्रगट
करितील. २० परमेश्वर म्हणतो, परमेश्वराच्या मंदिरांत
जसें इस्राएल लोक परमेश्वरास शुद्ध पात्रांतून अन्नार्पण
आणितात तसें सर्व राष्ट्रांमधून तुमच्या बांध ंस
अर्पण म्हणून घोड्यांवर, रथांत, पालख्यांत, खेच र
व सांडणींवर बसून यरुशलेमास माझ्या पवित्र
पर्वतावर आणितील. २१ त्यांच्यांतून कांहीं जण याजक
व लेवी व्हावे म्हणून मी घेईन असें परमेश्वर म्हणतो.

२२ कारण मी नवें आकाश व नवी पृथ्वी निर्माण
करणार; तीं जशीं मजसमोर टिकून राहतील तसा
तुमचा वंश व तुमचें नांव टिकून राहील असें परमेश्वर
म्हणतो. २३ असें होईल कीं एका चंद्रदर्शनापासून
दुसऱ्या चंद्रदर्शनापर्यंत, एका शब्बाथापासून दुसऱ्या
शब्बाथापर्यंत सर्व मनुष्यजाति मजपुढें भजनपूजन
करण्यास येईल, असें परमेश्वर म्हणतो. २४ ज्या
मनुष्यांनीं मजविरुद्ध बंड केलें त्यांचीं प्रेतें ते बाहेर
जाऊन पाहतील; कारण त्यांस लागलेली कीड कधीं
मरावयाची नाहीं; त्यांस लागलेला अग्नि कधीं विझावयाचा
नाहीं; सर्व मानवजातीस त्यांची किळस येईल.

# यिर्मया



१ बन्यामीन प्रांतांतील अनाथोथ एथल्या
1 याजकांपैकीं हिल्कीयाचा पुत्र यिर्मया याचीं वचनें:
२ यहूदाचा राजा आमोनपुत्र योशीया याच्या
कारकीर्दीच्या तेराव्या वर्षी परमेश्वराचें वचन यिर्मयास
आलें. ३ तसेंच यहूदाचा राजा योशीयापुत्र यहो-
याकीम याच्या काळापासून यहूदाचा राजा योशीया-
पुत्र सिदकीया याच्या कारकीर्दीच्या अकराव्या
वर्षाच्या अखेरपर्यंत म्हणजे पांचव्या महिन्यांत यरु-

यरुशलेमकरांस बंदिवान करून नेलें तेथवर तें वचन आलें.
४ परमेश्वराचें वचन मला आलें तें असें: ५ मीं
तुला गर्भाशयांत घडिलें त्यापूर्वी तूं मला ठाऊक होतास,
तूं उदरांतून निघाल्यापूर्वी मीं तुला पवित्र केलें, मीं
तुला राष्ट्रांचा संदेष्टा नेमिलें आहे. ६ तेव्हां मी
म्हणालों, अहा, प्रभु परमेश्वरा, पाहा, मला बोलावयाचें
ठाऊक नाहीं; मी केवळ बाळ आहें. ७ मग परमेश्वर
मला म्हणाला, मी बाळ आहें असें म्हणूं नको;
ज्या कोणाकडे मी तुला पाठवीन त्याजकडे तूं जा व
तुला आज्ञापीन तें बोल. ८ त्यांस तूं भिऊं नको; तुझा
बचाव करण्यास मी तुझ्याबरोबर आहें, असें परमेश्वर
म्हणतो. ९ तेव्हां परमेश्वरानें आपला हात पुढें करून
माझ्या मुखास स्पर्श केला, व तो मला म्हणाला,
पाहा, मीं आपलीं वचनें तुझ्या मुखांत घातलीं आहेत;
१० पाहा, उपटण्यास व विध्वंस करण्यास, नासधूस
करण्यास व पाडून टाकण्यास, बांधण्यास व लागवड कर-
ण्यास मीं तुला आज राष्ट्रांवर व राज्यांवर नेमिलें आहे.
११ मग परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
यिर्मया, तुला काय दिसतें ? मीं म्हणालों, मला
बदामीच्या झाडाची डहाळी दिसते. १२ परमेश्वर मला
म्हणाला, तुला ठीक दिसलें; मी आपलें वचन पूर्ण
करण्यास सावध राहीन. १३ परमेश्वराचें वचन पुन-
रपि मला प्राप्त झालें कीं तुला काय दिसतें ? मी म्हणालों,
एक उकळती कढई दिसते, तिचें तोंड उत्तरेकडून फिरलें
आहे. १४ तेव्हां परमेश्वर मला म्हणाला, देशाच्या सर्व
रहिवाश्यांवर उत्तरेकडून अरिष्ट उद्भवेल. १५ कारण
पाहा, मी उत्तरेकडल्या राष्ट्रांतील सर्व जाती बोलावीत
आहे असें परमेश्वर म्हणतो; ते येऊन यरुशलेमाच्या
वेशींपुढें, त्याच्या सभोवार असलेल्या सर्व तटांपुढें व
यहूदाच्या सर्व नगरांपुढें आपआपलीं सिंहासनें
स्थापितील. १६ त्यांनीं मला सोडिलें आहे, अन्य
देवांपुढें धूप जाळिला आहे व आपल्या हातच्या
कृतींची पूजा केली आहे; त्यांच्या या सर्व दुष्टतेबद्दल
मी त्यांस शिक्षा सांगेन. १७ तूं तर आपली कंबर
कस; ऊठ, मी तुला आज्ञापितो तें सर्व त्यांस सांग;
त्यांस घाबरूं नको; घाबरलास तर मी तुला त्यांच्या
पुढें घाबरवीन. १८ पाहा, आज या सगळ्या देशा-
विरुद्ध, यहूदाचे राजे, त्याचे सरदार, त्याचे याजक व
देशांतील लोक यांच्याविरुद्ध तुला मी तटबंदीचें नगर,
लोहस्तंभ, पितळी कोट असें करितों. १९ ते तुजबरोबर
सामना करितील पण तुजवर त्यांचा वरचष्मा होणार
नाहीं; कारण तुझा बचाव करण्यास मी तुझ्याबरोबर
आहें असें परमेश्वर म्हणतो.

२ १ तेव्हां परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
२ जा, हें पुकारून यरुशलेमाच्या कानीं पाड:
परमेश्वर असें म्हणतो कीं तुझें तारुण्यांतलें प्रेम,
वाङ्निश्चयाच्या वेळचा तुझा अनुराग व रानांत पडीत
स्थळीं तुझें माझ्यामागून येणें यांचें मला स्मरण
आहे. ३ इस्राएल परमेश्वराला पवित्र, त्याच्या उपजाचें
प्रथम फळ असा होता; त्याला गिळून टाकणारे सर्व दोषी
ठरले. त्यांच्यावर अरिष्ट आलें, असें परमेश्वर म्हणतो.
४ हे याकोबाच्या घराण्या, इस्राएल घराण्यांतील
सर्व गोत्रांनो, परमेश्वराचें वचन ऐका; ५ परमेश्वर
म्हणतो कीं तुमच्या पूर्वजांस माझ्या ठायीं असा
कोणता अन्याय आढळला कीं ते मजपासून दूर गेले
व शून्याच्या मागें लागून शून्यच झाले ? ६ ते असेंहि
म्हणाले नाहींत कीं ज्या परमेश्वरानें आम्हांस मिसर
देशांतून आणिलें, आम्हांस रानांतून, वैराण व खांच-
खळग्यांच्या प्रदेशांतून, निर्जल देशांतून व मृत्युच्छायें-
तून नेलें, ज्या प्रदेशांतून कोणी जातयेत नाहीं व
जेथें मनुष्यवस्ती नाहीं त्यांतून आम्हांस नेलें, तो
परमेश्वर कोठें आहे ? ७ मीं तुम्हांस सुपीक भूमीवर
तिचा उपज खाण्यासाठीं व तिची संपत्ति भोगण्यासाठीं
आणिलें, पण तुम्हीं येऊन माझा देश विटाळिला, माझें
वतन तुम्हीं अमंगळ केलें आहे. ८ परमेश्वर कोठें आहे
असें याजक म्हणाले नाहींत व धर्मशास्त्राचा कारभार
चालविणाऱ्यांनीं मला जाणिलें नाहीं; लोकपालहि

१ मुळांत : शाकेद
२ मुळांत : शोकेद.

मजपासून फितले; संदेष्टे बालदैवताच्या नांवानें भाषणें
करूं लागले व निरर्थक गोष्टींच्या मागें लागले; ९ म्हणून
मी तुम्हांशीं आणखी वाद करीन, मी तुमच्या मुलांच्या
मुलांशीं वाद चालवीन असें परमेश्वर म्हणतो.
१० कित्ती लोकांच्या द्वीपांत जाऊन पाहा, केदारास
कोणास तरी पाठवून नीट विचार करा, व असल्या गोष्टी
कधीं झाल्या आहेत कीं काय तें पाहा. ११ जे देवच
नव्हत असले देव तरी कोणा राष्ट्रानें बदलिले काय ? तरी
पण माझ्या लोकांनीं आपल्या वैभवाचा मोबदला जींत
हित नाहीं अशा गोष्टीशीं केला आहे. १२ हे आकाशा,
हें पाहून भयचकित हो; थरथर कांप, शुष्क होऊन जा,
असें परमेश्वर म्हणतो. १३ कारण माझ्या लोकांनीं
दुहेरी दुष्कर्म केलें; मी जो जीवंत पाण्याचा झरा, त्या
मला त्यांनीं सोडिलें आणि ज्यांत पाणी राहणार नाहीं असे
फुटके हौद आपल्यासाठीं खोदून तयार केले. १४ इस्रा-
एल गुलाम आहे काय ? तो घरीं जन्मलेला दास आहे
काय ? तर तो लूट कां झाला आहे ? १५ तरुण सिंहांनीं
त्याजवर गर्जना केली आहे, त्यांनीं महानाद केला आहे;
त्यांनीं त्याचा देश उजाड केला आहे, त्याचीं नगरें
जाळूनपोळून निर्जन केलीं आहेत. १६ नोफ व तह-
पन्हेस यांच्या लोकांनीं तुला खाऊन टाकिलें आहे.
१७ तुझा देव परमेश्वर तुला मार्गानें नेत असतां त्याला
सोडून तूं हें आपणावर आणिलें नाहीं काय ? १८ मिसर
देशाच्या वाटेस लागून नील नदीचें पाणी पिण्याचें
तुला काय प्रयोजन ? अश्शूर देशाच्या वाटेस लागून
फरात नदीचें पाणी पिण्याचें तुला काय प्रयोजन ?
१९ तुझीच दुष्टता तुला शासन करील, तुझीच धर्म-
भ्रष्टता तुला शिक्षा करील; तर हें समजून घेऊन ध्यानांत
आण कीं परमेश्वर जो तुझा देव त्याला तूं सोडिलें आहे;
आणि तुला माझा धाक वाटत नाहीं हें अनिष्टकारक व
क्लेशदायक आहे, असें प्रभु सेनाधीश परमेश्वर म्हणतो;
२० कारण प्राचीन काळीं तूं आपलें जूं मोडिलें, आपलीं
बंधनें तोडिलीं आणि तूं म्हणालीस मी सेवा करावयाची नाहीं;
आणि तूं कसबिणीसारखी प्रत्येक उंच टेकडीवर व प्रत्येक
हिरव्या झाडाखालीं ओणवी झालीस. २१ मीं तर तुला
उत्कृष्ट जातीची उत्तम द्राक्षालता अशी लाविली, ती तूं
माझ्यासमोर परदेशची हीनजातीची द्राक्षालता कशी
झालीस ? २२ तर तूं आपणास खारानें धुतलें व
आपणास पुष्कळसा साबण लाविला तरी माझ्या दृष्टीनें
तुझ्या पापाचा डाग तसाच राहील असें प्रभु परमेश्वर
म्हणतो. २३ मी भ्रष्ट झालें नाहीं, बालदैवतांच्या मागें
गेलें नाहीं, असें तुला कसें म्हणतां येईल ? खोऱ्यांत तूं
काय केलें त्या तुझ्या वर्तनाचा विचार करून पाहा, तूं
चपल, तरुण सांडणीसारखी इकडून तिकडे धावत
आहेस. २४ ती रानांत हिंडावयाला सवकलेली, कामा-
तुर होऊन धापा टाकणारी रानगाढवी आहे; ती
हातेणास आली असतां तिला कोण रोखील ? तिला
धरावयास जाणाऱ्यांनीं शिणण्याचें कारण नाहीं; तिच्या
ऋतूंत ती हातीं लागेल. २५ आपले पाय झिजूं देऊं
नको, आपल्या घशास कोरड पडूं देऊं नको; पण तूं
म्हणालीस, काय उपयोग ? कांहीं नाहीं; मीं परक्यांवर
प्रेम केलें आहे, त्यांच्यामागें मी जाणार. २६ चोरास
पकडिलें म्हणजे तो जसा लाजतो तसें इस्राएलाचें घराणें
लज्जित झालें आहे; ते, त्यांचे राजे, त्यांचे सरदार, त्यांचे
याजक व त्यांचे संदेष्टे लज्जित झाले आहेत. २७ ते
काष्ठास म्हणतात, तूं माझा बाप; पाषाणास म्हणतात,
तूं मला जन्म दिला; त्यांनीं मजकडे मुख नव्हे तर
पाठ फिरविली; तरी संकटसमयीं ते म्हणतील, ऊठ;
आमचा बचाव कर. २८ तर तूं आपणासाठीं केलेले
देव कोठें आहेत ? तुझ्या संकटसमयीं ते उठून तुला
बचावतील कीं काय तें पाहा, कारण हे यहूदा, तुझ्या
नगरांइतकी तुझ्या दैवतांची संख्या आहे.

२९ तर तुम्ही मजशीं कां वाद घालितां ? तुम्हीं
सर्वांनीं मजविरुद्ध पाप केलें आहे, असें परमेश्वर
म्हणतो. ३० तुमच्या पुत्रांस मीं ताडन केलें तें व्यर्थ,
त्यानें ते शुद्धीवर आले नाहींत; फाडणाऱ्या सिंहाप्रमाणें
तुमच्याच तरवारीनें तुमच्या संदेष्ट्यांस खाऊन टाकिलें
आहे. ३१ अहो, ह्या पिढीचे लोकहो ! तुम्ही परमे-
श्वराचें वचन लक्षांत आणा; मी इस्राएलास वैराण
निबिड काळोखाचें स्थल असा झालों आहें काय

आम्ही मोकार झालों आहों, यापुढें आम्ही तुजकडे
येणार नाहीं असें माझे लोक कां म्हणतात ?
३२ कुमारी आपलीं भूषणें, नवरी आपला पोशाख
विसरेल काय ? तरी माझे लोक अगणित दिवस मला
विसरले आहेत. ३३ तूं फार छानछोकी करून इष्का-
मागें कशी लागली आहेस ! अशानें तूं आपली चाल दुष्ट
स्त्रियांसहि शिकविली आहे. ३४ निर्दोष, दीन जनांच्या
जिवांचें रक्त तुझ्या अंगावरील वस्त्रांत सांपडलें आहे;
ते तुझें घर फोडितांना तुझ्या हातीं लागले नाहींत, तर
ह्या सर्वांला तुझें वर्तन कारण झालें. ३५ तरी तूं म्हणा-
लीस, मी निर्दोष आहें, त्याचा राग मजवरून फिरलाच
आहे; तूं म्हणालीस, मीं पाप केलें नाहीं म्हणून पाहा,
मी तुजशीं दावा चालवीन. ३६ आपली चाल बदलून
इकडून तिकडे कां भटकतेस ? तूं अश्शुरामुळें खजील
झालीस तशी मिसरामुळेंहि होशील. ३७ तूं हातांनीं
आपलें कपाळ बडवीत त्याजपासूनहि निघून जाशील;
कारण तुझी भिस्त ज्यांवर आहे त्यांस परमेश्वरानें
धिक्कारिलें आहे, व त्यांच्यायोगें तुझें कल्याण
होणार नाहीं.

३ १ परमेश्वर म्हणतो, कोणीं आपली बायको
टाकिली व ती त्याच्यापासून निघून जाऊन दुसऱ्याची
झाली तर तो पुनः तिच्याकडे परत जाईल
काय ? अशानें देश भ्रष्ट होणार नाहीं काय ? तूं तर
अनेक जारांशीं व्यभिचार केला तरी तूं मजकडे पुनः
फिरूं पाहतेस काय ? असें परमेश्वर म्हणतो. २ डोळे
वर करून उजाड टेकड्यांकडे पाहा; जेथें तुझ्याजवळ
कोणी निजला नाहीं असें कोणतें ठिकाण उरलें आहे ?
रानांत अरब दबा धरितो तशी तूं त्यांच्या वाटा धरून
बसलीस; तूं आपल्या शिंदळकीनें व दुष्टतेनें देश भ्रष्ट
केला आहे. ३ ह्यामुळें पर्जन्यवृष्टि आवरण्यांत आली
आहे आणि वळवाचा पाऊस पडला नाहीं; तरी तुझें
कपाळ पडलें कसबिणीचें; तुला लाज कशी ती ठाऊक
नाहीं. ४ माझ्या बापा, माझ्या तारुण्यांतील मार्गदर्शक
तूंच आहेस, असें तूं आतांपासून मला म्हणणार
नाहींस काय ? ५ तो नेहमीं मनांत अढी धरील काय ?
तो सर्वकाळ ती ठेवील काय ? पाहा, तूं असें बोलतेस
खरी, तरी कुकर्में करितेस व आपलाच क्रम चालवितेस.
६ ह्याशिवाय योशीया राजाच्या कारकीर्दींत परमेश्वर
मला म्हणाला, मला सोडून जाणारी इस्राएल हिनें काय
केलें हें तूं पाहिलें आहे काय ? प्रत्येक उंच पर्वतावर व
प्रत्येक हिरव्या झाडाखालीं जाऊन तेथें तिनें व्यभिचार
केला. ७ मी म्हणालों, हें सर्व केल्यावर तरी तिनें मज-
कडे परत यावें ना ? पण ती आली नाहीं; तिची
बेइमान बहीण यहूदा हिनें हें पाहिलें; ८ आणि तिला
जरी असें दिसून आलें कीं मला सोडून जाणारी इस्राएल
हिला जारकर्म केल्यामुळें मीं टाकून सूटपत्र दिलें,
तरी तिची बेइमान बहीण यहूदा, हिला बिलकूल
भीति वाटली नाहीं; तीहि जाऊन व्यभिचार करूं
लागली. ९ तिच्या व्यभिचाराच्या स्वैरतेनें देश भ्रष्ट
झाला; तिनें काष्ठपाषाणांशीं व्यभिचार केला. १० इतकें
असूनहि तिची बेइमान बहीण यहूदा मनापासून मज-
कडे वळली नाहीं, तर कपटानें वळली असें परमेश्वर
म्हणतो. ११ परमेश्वर मला म्हणाला, बेइमान यहूदा-
पेक्षां मला सोडून जाणारी इस्राएल कमी दोषी
आहे. १२ जा, उत्तरेकडे हें पुकारून सांग कीं हे
मार्ग सोडून जाणाऱ्या इस्राएले, मागें फीर, असें
परमेश्वर म्हणतो; मी तुजकडे रागानें पाहणार नाहीं,
कारण मी कृपाळू आहें; मी सदा क्रोधयुक्त राहणार
नाहीं, असें परमेश्वर म्हणतो. १३ तूं आपला देव पर-
मेश्वर याजपासून पतन पावून इकडेतिकडे प्रत्येक
हिरव्या झाडाखालून परक्याबरोबर भटकलीस व माझा
शब्द ऐकला नाहीं, हा आपला दोष मात्र पदरीं घे,
असें परमेश्वर म्हणतो. १४ परमेश्वर म्हणतो, मुलांनो,
मागें फिरा, कारण मी तुमचा नवरा आहें; मी तुम्हांस
या शहरांतून एक, त्या कुळांतून दोघे, असे घेऊन
सीयोनास आणीन. १५ मी तुम्हांस माझ्या मनासारखे
मेंढपाळ देईन; ते तुम्हांस ज्ञान व अकल ह्यांनीं तृप्त
करितील. १६ परमेश्वर म्हणतो, तुम्ही वाढून
देशांत बहुगुणित व्हाल त्या काळीं परमेश्वराच्या
कराराचा कोश असें ते यापुढें म्हणणार नाहींत, तो

त्यांच्या ध्यानींहि येणार नाहीं, त्यांस तो आठवणारहि
नाहीं, ते त्याची खंत करणार नाहींत, आणि तो पुनः
बनविणार नाहींत. १७ त्या काळीं यरुशलेमास परमे-
श्वराचें सिंहासन म्हणतील, त्याच्याकडे सर्व राष्ट्रें जमा
होतील, कारण परमेश्वराचें नाम यरुशलेमांत आहे;
यापुढें तीं आपल्या दुष्ट अंतःकरणाच्या हट्टाप्रमाणें
चालणार नाहींत. १८ त्या काळीं यहूदाचें घराणें इस्रा-
एलाच्या घराण्याबरोबर चालेल, ते उत्तरेकडील देशां-
तून निघून एकवट होतील व तुमच्या पूर्वजांस मीं वतन
करून दिलेल्या देशास येतील. १९ मीं तुला पुत्राच्या
योग्यतेस आणावें, तुला मनोरम भूमि द्यावी, राष्ट्रांतील
श्रेष्ठ वैभवाचें वतन तुला द्यावें असें मला वाटलें होतें;
तुम्ही मला, माझ्या बापा, असें म्हणाल व मला अनु-
सरावयाचें सोडून मागें फिरणार नाहीं असें मला वाटलें
होतें. २० इस्राएलाच्या घराण्या, बायको बेइमान होऊन
आपल्या पतीस सोडिते तसे तुम्ही मजशीं बेइमान
झालां आहां, असें परमेश्वर म्हणतो. २१ उजाड
टेकड्यांवर शब्द ऐकूं येत आहे, इस्राएलवंशजांच्या
आक्रंदनाचा व विनवण्यांचा शब्द कानीं येत आहे;
कारण त्यांनीं वाकडा मार्ग धरिला आहे, तें आपला देव
परमेश्वर यास विसरले आहेत. २२ अहो मला सोडून
जाणाऱ्या मुलांनो, मागें फिरा, मी तुम्हांला वाटेवर
आणीन. पाहा, आम्ही तुजकडे वळतों, कारण तूं परमेश्वर
आमचा देव आहेस. २३ टेकड्यांवरील शब्द, डोंगरां-
वरील गडबड खोटी ठरली आहे; खरोखर आमचा
देव परमेश्वर याच्या ठायीं इस्राएलाचें तारण आहे.
२४ आमच्या बालपणापासून आमच्या वडिलांचें श्रम-
फळ म्हणजे त्यांचीं शेरडेंमेंढरें, त्यांचीं गुरेंढोरें, त्यांचे
पुत्र व कन्या यांस ह्या लज्जास्पद दैवतानें ग्रासून टाकिलें
आहे. २५ आपण आपल्या लज्जेंत लोळूं या, आमची
अप्रतिष्ठा आम्हांस झाको; कारण आम्हीं व आमच्या
पूर्वजांनीं बाळपणापासून आजवर आमचा देव परमेश्वर
याच्याविरुद्ध पाप केलें आहे आणि आमचा देव परमेश्वर
याच्या वाणीकडे लक्ष दिलें नाहीं.

४ १ परमेश्वर म्हणतो, हे इस्राएले, जर तूं मजकडे
वळशील, आपलीं अमंगल कृत्यें माझ्यासमोरून दूर
करिशील, बहकणार नाहींस, २ आणि सत्यानें, धर्मानें
व सरळपणानें परमेश्वराच्या जीविताची शपथ वाहशील,
तर राष्ट्रें परमेश्वराच्या ठायीं आपणांस धन्य गणितील व
त्याचा अभिमान बाळगितील.

३ कारण परमेश्वर यहूदा व यरुशलेम यांतल्या
लोकांस म्हणतो, आपली पडीत जमीन नांगरा, कांट्यां-
मध्यें पेरूं नका. ४ यहूदाचे लोकहो, यरुशलेमकरहो,
परमेश्वराप्रीत्यर्थ आपली सुंता करा, आपल्या अंतः-
करणाची सुंता करा; नाहींतर तुमच्या कर्मांच्या
दुष्टतेमुळें माझा क्रोध अग्नीसारखा भडकेल आणि तो
कोणाच्यानें विझवणार नाहीं असा पेटेल. ५ यहूदांत
पुकारा, यरुशलेमांत जाहीर करा, आणि म्हणा कीं देशांत
रणशिंग फुंका; जोरानें ओरडून म्हणा, एकत्र व्हा, चला,
आपण तटबंदीच्या नगरांत जाऊं. ६ सीयोनाच्या दिशे-
कडे ध्वजा उभारा; आश्रयासाठीं पळा, थांबूं नका,
कारण मी उत्तरेकडून अरिष्ट, मोठा नाश, आणीत आहें.
७ सिंह आपल्या झाडींतून बाहेर निघाला आहे;
राष्ट्रांस फस्त करणारा वाट चालत आहे, तुझा देश
ओस करण्यासाठीं, तुझीं नगरें उजाड, निर्जन करण्या-
साठीं तो आपल्या स्थानांतून निघाला आहे; ८ म्हणून
तुम्हीं कंबरेस गोणताट गुंडाळा, शोक व आक्रंदन
करा; कारण आम्हांवरला परमेश्वराचा तीव्र कोप अजून
गेला नाहीं. ९ परमेश्वर म्हणतो, त्या दिवशीं असें
होईल कीं राजाचें व सरदारांचें काळीज ठाव सोडील.
याजकांची त्रेधा उडेल आणि संदेष्टे भयचकित होतील.
१० तेव्हां मी म्हणालों, अहा, प्रभु परमेश्वरा, तुमचें
कुशल होईल असें म्हणून तूं या लोकांस व यरुशलेमास
खरोखर फारच चळविलें आहे; इकडे तर तरवार
जिवाला जाऊन लागली आहे. ११ त्या काळीं या
लोकांस व यरुशलेमास म्हणतील, रानांतील उजाड
टेकड्यांवरून उष्ण वारा माझ्या लोकांच्या कन्येवर येत

आहे, तो कांहीं निवडणवारा म्हणून किंवा स्वच्छ कर-
ण्यासाठीं येत नाहीं. १२ या कामास लागतो त्याहून
जोराचा वारा माझ्या कार्यासाठीं येईल; मी आतां त्यांच्या
शिक्षाहि सांगतों. १३ पाहा, ढगांप्रमाणें तो येत आहे,
त्याचे रथ वादळाप्रमाणें आहेत, त्याचे घोडे गरुडांपेक्षां
वेगवान् आहेत. आम्ही हायहाय करणार! आमचें
वाटोळें झालें. १४ हे यरुशलेमे, तूं आपल्या अंतःकरणा-
ची दुष्टता धुऊन टाक, म्हणजे वांचशील. तुझे वाईट
विचार तुजमध्यें कोठवर वसणार? १५ कारण दाना-
कडून शब्द होत आहे, एफ्राईम डोंगराकडून अरिष्टाची
घोषणा होत आहे, १६ ती राष्ट्रांस सांगा; पाहा, ती
यरुशलेमेस जाहीर करा; दूर देशांतून वेढा घालणारे
येत आहेत, यहूदाच्या नगरांसमोर ते ललकारत
आहेत. १७ शेत राखणाऱ्यांसारखें त्यांनीं तिला चोहों-
कडून घेरिलें आहे, कारण तिनें मजशीं फितुरी केली
आहे असें परमेश्वर म्हणतो. १८ तुझें वर्तन व तुझीं
कर्में यामुळें तुला हा प्रसंग प्राप्त झाला आहे; ही तुझी
दुष्टता आहे; ती खरोखर क्लेशदायी आहे, तुझ्या
हृदयास ती भिडली आहे.

१९ माझीं आंतडीं तुटतात हो तुटतात! माझ्या
हृदयकोशास वेदना होत आहेत! माझें अंतर्याम
अस्वस्थ झालें आहे! माझ्यानें स्तब्ध राहवत नाहीं!
कारण माझ्या जिवा, करण्याचा नाद, रणशब्द
तूं ऐकला आहे. २० नाशावर नाश पुकारिला आहे;
कारण सर्व देश लुटिला आहे; माझे डेरे अकस्मात्,
माझ्या कनाती क्षणांत लुटिल्या आहेत. २१ मी ध्वजा
कोठवर पाहूं? करण्याचा शब्द कोठवर ऐकूं? २२ कारण
माझे लोक मूर्ख आहेत, ते मला ओळखीत नाहींत; तीं
निर्बुद्ध, असमंजस अशीं मुलें आहेत; वाईट करण्यांत
तीं हुशार आहेत, पण बरें करण्याचें त्यांस ज्ञान नाहीं.

२३ मीं पृथ्वीकडे पाहिलें तों ती वैराण व शून्य
झाली आहे; आकाशाकडे पाहिलें तों त्यांत प्रकाश
नाहीं. २४ मीं पर्वतांकडे पाहिलें तों ते कांपत आहेत;
सर्व डोंगर डळमळत आहेत. २५ मीं पाहिलें तों
कोणी मनुष्य नाहीं व आकाशांतील सर्व पक्षी उडून
गेले आहेत. २६ मीं पाहिलें तों पाहा, बागाईत वैराण
झाली आहे व परमेश्वरासमक्ष, त्याच्या तीव्र कोपानें
तेथील सर्व नगरें नष्ट झालीं आहेत. २७ परमेश्वर
म्हणतो, सर्व देश उजाड होईल; पण मी त्याचा पुरा
अंत करणार नाहीं. २८ यामुळें पृथ्वी शोक करील,
वर आकाश काळें होईल; कारण मी असें बोललों
आहें, मीं हें योजिलें आहे; मी अनुताप पावणार
नाहीं; मी माघार घेणार नाहीं. २९ घोडेस्वारांच्या व
तिरंदाजांच्या शब्दांनीं सर्व शहर पळत आहे; ते
झाडींत, खडकांच्या फटींत लपत आहेत; लोकांनीं
प्रत्येक नगर सोडिलें आहे, कोणी माणूस त्यांत राहत
नाहीं. ३० हे लुटलेल्ये, तूं काय करिशील? तूं जांभळें
वस्त्र ल्यालीस, सोन्याच्या अलंकारांनीं भूषित झालीस,
काजळ घालून आपले डोळे मोठे केले, तरी तुझी
सुरेख दिसण्याची खटपट व्यर्थ आहे; तुझे जार तुला
तुच्छ मानितात, ते तुझ्या प्राणावर टपत आहेत.
३१ वेणा देणाऱ्या स्त्रीच्या शब्दासारखा शब्द मी
ऐकत आहें; प्रथम प्रसूत होणाऱ्या स्त्रीच्या वेदनां-
प्रमाणें वेदना ऐकत आहें; सीयोनेच्या कन्येचा स्वर
ऐकूं येत आहे; ती उसासे टाकीत आहे, ती आपले
हात पसरीत आहे; ती म्हणत आहे, हायरे हाय!
कारण ह्या मनुष्यघातक्यांपुढें माझा जीव घाबरा
होत आहे.

५ १ यरुशलेमाच्या गल्ल्यांतून इकडून तिकडे धावा
व पाहून आपली खातरी करून घ्या; त्याच्या चौकांत
शोध करा कीं कोणी धर्मानें वागणारा, सत्याची
कास धरणारा सांपडेल काय? सांपडल्यास मी त्याला
क्षमा करीन. २ परमेश्वराच्या जीविताची शपथ, असें
ते म्हणतात, तरी ती शपथ खोटी आहे. ३ हे परमेश्वरा,
तुझे नेत्र सत्याकडे नाहींत काय? तूं त्यांस ताडण
करितोस तरी ते दुःखित होत नाहींत; तूं त्यांस क्षीण
करितोस तरी ते ताळ्यावर येत नाहींत, ते आपलीं तोंडें
वज्रापेक्षां कठीण करितात, ते वळत नाहींत. ४ तेव्हां
मीं म्हटलें, हे तुच्छ आहेत, हे मूर्ख आहेत, परमे-
श्वराचा मार्ग, त्यांच्या देवाची धर्मनीति त्यांस ठाऊक

नाहीं. ५ ह्याकरितां मी महाजनांकडे जाऊन त्यांच्याशीं
बोलेन; कारण त्यांस परमेश्वराचा मार्ग, त्यांच्या
देवाची धर्मनीति ठाऊक आहे; पण त्यांनीं तर जोखड
साफ मोडिलें आहे व बंधनें तोडून टाकिलीं आहेत.
६ यास्तव रानांतला सिंह त्यांस फाडील, वनांतला
लांडगा त्यांस फस्त करील, चित्ता त्यांच्या नगरांजवळ
दबा धरून तेथून बाहेर पडणाऱ्या प्रत्येकाचे फाडून
तुकडे करील; कारण त्यांचे अपराध व त्यांची धर्म-
भ्रष्टता हीं बहुत आहेत. ७ तुला क्षमा कशी करूं?
तुझ्या पुत्रांनीं मला सोडिलें आहे व जे देव नव्हत
त्यांची त्यांनीं शपथ वाहिली आहे; मीं त्यांस पोटभर चारिलें
तेव्हां त्यांनीं जारकर्म केलें व वेश्यांच्या घरांत गर्दी
केली. ८ खाऊन मस्त झालेल्या घोड्याप्रमाणें ते
चोहोंकडे फिरतात; त्यांतला प्रत्येक आपल्या शेजाऱ्या-
च्या बायकोला पाहून खिंकाळतो. ९ परमेश्वर म्हणतो,
याबद्दल मी नाहीं का समाचार घेणार? माझा आत्मा
या असल्या राष्ट्रांचें परिपत्य नाहीं का करणार?

१० तिच्या द्राक्षावेलांच्या रांगांत शिरा व नासधूस
करा; तरी पुरी नासधूस करूं नका. तिच्या फांद्या
तोडून टाका, त्या परमेश्वराच्या नाहींत, ११ कारण
इस्राएलाचें घराणें व यहूदाचें घराणें हीं मजशीं बेइमान-
पणें वागलीं आहेत असें परमेश्वर म्हणतो. १२ ते
परमेश्वराला अवमानून म्हणतात, तो नाहींच; आम्हांवर
अरिष्ट म्हणून येणार नाहीं, आम्ही तरवार व दुष्काळ
पाहणार नाहीं. १३ संदेष्टे वायुरूप होतील, त्यांच्याकडे
संदेश नाहीं; त्यांची अशी गति होईल. १४ यामुळें
परमेश्वर, सेनाधीश देव म्हणतो, तुम्ही असें बोलतां म्हणून
पाहा, मी आपले शब्द तुझ्या मुखांत अग्नि असे आणि
हे लोक सर्पण असे करीन आणि तो त्यांस खाऊन टाकील.
१५ परमेश्वर म्हणतो, हे इस्राएलाच्या घराण्या, पाहा,
मी तुम्हांवर दुरून एक राष्ट्र आणितों; तें बळकट व
प्राचीन राष्ट्र आहे; तुला त्यांची भाषा माहीत नाहीं,
तुला त्यांचें बोलणें समजणार नाहीं. १६ त्यांचा भाता
उघडी कबर आहे; ते सर्व पराक्रमी वीर आहेत.
१७ ते तुझें पीक, तुझ्या मुलाबाळांचें अन्न खाऊन
टाकितील; ते तुझीं शेरडेंमेंढरें, तुझीं गुरेंढोरें, खाऊन
टाकितील; तुझ्या द्राक्षलता व अंजिराचीं झाडें फस्त
करितील; ज्या तटबंदीच्या नगरांवर तुझी भिस्त आहे
त्यांस ते तरवारीनें उद्ध्वस्त करितील. १८ तरी त्या
समयींहि मी तुमचा पुरा अंत करणार नाहीं असें
परमेश्वर म्हणतो. १९ जर तुम्ही म्हणाल कीं परमेश्वर
आमचा देव त्यानें आमचें असें कां केलें? तर तूं
त्यांस सांग कीं तुम्हीं मला सोडून आपल्या देशांत
अन्य दैवतांची सेवा केली तशी जो देश तुमचा नाहीं
त्यांत तुम्ही परक्यांची सेवा कराल.

२० याकोबघराण्यामध्यें हें पुकारा आणि यहूदामध्यें
जाहीर करून म्हणा कीं २१ मूर्ख, बुद्धिहीन लोकहो, हें
आतां ऐका; तुम्हांस डोळे असून दिसत नाहीं, तुम्हांस
कान असून ऐकूं येत नाहीं. २२ परमेश्वर म्हणतो, तुम्ही
माझें भय धरणार नाहीं काय? मजपुढें थरथर कांपणार
नाहीं काय? मीं तर समुद्राला वाळू ही सीमा नेमिली
आहे; ही सर्वकाळची मर्यादा त्याच्यानें उल्लंघवत
नाहीं; त्याच्या लाटा उचंबळतात तरी त्यांचें कांहीं
चालत नाहीं; त्या गर्जना करितात तरी त्यांना ती
उल्लंघवत नाहीं. २३ तरी या लोकांचें हृदय हट्टी व फितुरी
आहे; ते फितून निघून गेले आहेत. २४ जो परमेश्वर
आमचा देव आम्हांस पाऊस देतो, योग्य समयीं
आगोठीचा व वळवाचा पाऊस वर्षितो, जो कापणीचीं
नेमिलेलीं सप्तकें आम्हांसाठीं राखून ठेवितो त्याचें भय
आम्ही धरूं, असें ते आपल्या मनांत म्हणत नाहींत.
२५ तुमच्या दुष्कर्मांनीं हीं फिरविलीं आहेत, तुमच्या
पातकांनीं तुमचें हित रोखून धरिलें आहे. २६ कारण
माझ्या लोकांमध्यें दुष्ट जन आढळतात, ते फासेपारध्या-
प्रमाणें दबा धरितात; ते सापळा मांडून माणसांना
धरितात. २७ पिंजरा पक्ष्यांनीं भरलेला असतो तशीं
त्यांचीं घरें कपटाच्या प्राप्तीनें भरलेलीं असतात;
म्हणून ते थोर व श्रीमंत झाले आहेत. २८ ते धष्टपुष्ट
व तेजस्वी झाले आहेत, ते दुष्कर्मांची कमाल करितात;
आपली चलती व्हावी म्हणून ते पोरक्यांचा न्याय
करीत नाहींत, कंगालांस न्याय देत नाहींत. २९ परमे-

श्वर म्हणतो, या गोष्टींबद्दल मीं त्यांचा समाचार
नाहीं का घेणार ? माझा आत्मा या असल्या राष्ट्राचें
पारिपत्य नाहीं का करणार ?
३० चकित करणारें अघोर कृत्य देशांत घडलें
आहे. ३१ संदेष्टे खोटे संदेश देतात, त्यांच्या
धोरणानें याजक अधिकार चालवितात व माझ्या
लोकांसहि असेंच आवडतें; पण अखेरीस तुम्ही
काय करणार ?

६ १ बन्यामीनवंशजहो, यरुशलेमांतून रक्षणार्थ
पळून जा, तकोवांत रणशिंग फुंका, बेथ-हक्करेमावर
ध्वज उभारा; कारण उत्तरेकडून अरिष्ट व मोठा
नाश डोकावत आहे. २ सुंदर व सुकुमार अशा त्या
सीयोनकन्येचा मी उच्छेद करीन. ३ मेंढपाळ आपले
कळप घेऊन तिजकडे येतील, तिच्या आसपास आपले
तंबू ठोकितील, त्यांच्यांतला प्रत्येक आपआपल्या
स्थानीं चरेल. ४ तिच्याशीं लढण्याची तयारी करा;
उठा, आपण दुपारीं चढाई करूं. हाय हाय ! दिवस
कलला आहे, संध्याकाळची छाया वाढत आहे. ५ उठा,
आपण रात्रीं चढाई करून तिच्या वाड्यांचा नाश
करूं. ६ कारण सेनाधीश परमेश्वर म्हणाला आहे कीं
झाडें तोडून यरुशलेमासमोर मोर्चा रचा; पारिपत्य
करावयाचें तें याच नगराचें; त्याच्यांत जुलूमच जुलूम
माजला आहे. ७ झऱ्यांतून जसें नित्य नवें पाणी येतें
तशी त्यांत नित्य नवी दुष्टता घडते; त्याच्या ठायीं
बलात्कार व लुटालूट यांचा गोंगाट ऐकूं येतो; नित्य
माझ्यासमोर रोग आणि जखमा आहेत. ८ यरुशलेमा,
शुद्धीवर ये, नाहींतर तुजवरचा माझा जीव उडेल, मी
तुला ओसाड व निर्जन भूमि करीन.
९ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, द्राक्षालतांचा सरवा
काढितात तसा अवशिष्ट इस्राएलाचा सरवा साफ काढून
नेतील; द्राक्षें खुडणाऱ्याप्रमाणें तूं आपला हात डहा-
ळ्यांना घाल. १० मी हें कोणास सांगून पटवूं म्हणजे
ते ऐकतील ? पाहा, त्यांचा कान बेसुनत आहे, त्यांस
ऐकूं येत नाहीं; पाहा परमेश्वराचें वचन त्यांस निंदा-
स्पद झालें आहे, त्यांत त्यांस कांहीं संतोष वाटत
नाहीं. ११ ह्याकरितां मी परमेश्वराच्या संतापानें भरलों
आहें; तो दाबून ठेवितां ठेवितां मी थकलों आहें;
रस्त्यांतल्या पोरांवर, तरुणांच्या जमावावर तो सोड;
नवरा व बायको, वृद्ध व पुऱ्या वयाचे या सर्वांना तो
गांठील. १२ त्यांचीं घरें, शेतें व स्त्रिया हीं सर्व
दुसऱ्यांच्या हातीं जातील; मी आपला हात देशच्या रहि-
वाश्यांवर उगारीन असें परमेश्वर म्हणतो. १३ कारण
लहानथोर सर्व स्वहिताला हपापलेले आहेत; संदेष्ट्या-
पासून याजकापर्यंत सगळे कपटाचा व्यवहार करितात.
१४ शांतीचें नांव नसतां शांति शांति असें म्हणून
माझ्या लोकांचा घाय ते वरवर बरा करितात.
१५ त्यांनीं अमंगल कृत्य केलें त्याची त्यांस लाज
वाटली काय ? नाहीं; त्यांस लाज मुळींच वाटली
नाहीं; शरम कसली ती त्यांना ठाऊक नाहीं; म्हणून
पतन पावणाऱ्यांबरोबर ते पतन पावतील; मी त्यांचा
समाचार घेईन तेव्हां ते ठोकर खाऊन पडतील, असें
परमेश्वर म्हणतो.
१६ परमेश्वर म्हणतो, चवाठ्यावर उभें राहून
पाहा आणि पुरातन मार्गांपैकीं कोणता म्हणून विचारा;
सन्मार्गानें चाला; अशानें तुमच्या जिवास विश्रांति
मिळेल; पण ते म्हणाले, आम्ही चालणार नाहीं.
१७ मीं तुम्हांवर पहारेकरी ठेवून तुम्हांस म्हटलें,
रणशिंगाचा शब्द ऐका; पण ते म्हणाले, आम्ही ऐकत
नाहीं. १८ ह्याकरितां राष्ट्रांनो, तुम्ही ऐका; जमलेले
लोकहो, त्यांचें काय होतें तें समजून घ्या. १९ अगे
पृथ्वी, ऐक; पाहा, मी या लोकांच्या कल्पनांचें फळ,
अर्थात् विपत्ति, त्यांजवर आणीन; कारण त्यांनीं माझीं
वचनें ऐकलीं नाहींत, माझ्या नियमशास्त्राचा त्यांनीं
धिक्कार केला आहे. २० शबाहून ऊद व दूर देशाहून
अगरु मजकडे आणण्याचें काय प्रयोजन ? तुमच्या
होमबलींनीं मला संतोष नाहीं, तुमचे यज्ञबलि मला
पसंत नाहींत. २१ ह्याकरितां परमेश्वर म्हणतो, पाहा,
मी या लोकांच्या वाटेंत अडखुळे ठेवीन, बाप व लेक दोघेहि
त्यांवर ठोकर खाऊन पडतील; शेजारी आणि त्याचा
मित्र हे नाश पावतील.

२२ परमेश्वर असें म्हणतो कीं पाहा, उत्तरदेशाहून
एक राष्ट्र येत आहे; पृथ्वीच्या दिगंतांपासून एक मोठें
राष्ट्र उठत आहे. २३ ते लोक धनुष्यें व भाले धारण
करितात, ते क्रूर आहेत, त्यांस दयामाया नाहीं, ते
सागराप्रमाणें गर्जना करितात, ते घोड्यांवर स्वार झाले
आहेत; हे सीयोनकन्ये, ते युद्धास सिद्ध होऊन
तुजविरुद्ध एकजुटीनें येत आहेत. २४ आम्हीं त्यांचा
लौकिक ऐकला आहे; आमचे हात गळले आहेत,
आम्हांस क्लेश झाला आहे, प्रसवणाऱ्या स्त्रीप्रमाणें
वेणा लागल्या आहेत. २५ मैदानांत जाऊं नको,
कारण शत्रूची तरवार व भीति चोहोंकडे आहे.
२६ माझ्या लोकांच्या कन्ये, कमरेला गोणताट
गुंडाळ, राखेंत लोळ; एकुलत्या एका मुलाविषयींच्या
शोकाप्रमाणें शोक व आक्रंदन कर; कारण लुटारू
आम्हांवर एकाएकीं येईल.

२७ तूं त्याचा मार्ग जाणावा व पारखावा म्हणून
मीं तुला माझ्या लोकांत पारख करणारा व दुर्ग[1] असें
ठेविलें आहे. २८ ते सर्व फितुऱ्यांतले फितुरी आहेत,
ते चोहोंकडे चहाड्या करीत फिरतात, ते पितळ व
लोखंड आहेत, त्या सर्वांची वर्तणूक बिघडली आहे.
२९ भाता फुंक फुंक फुंकला आहे, शिसें जळून खाक
झालें आहे; ते गाळून गाळून थकले आहेत तरी
दुष्टांची छाननी कांहीं झाली नाहीं. ३० त्यांस टाकाऊ
रुपें म्हणतील, कारण परमेश्वरानें त्यांस टाकिलें आहे.

७ १ यिर्मयाला परमेश्वरापासून वचन प्राप्त झालें
तें हें: २ परमेश्वराच्या मंदिरद्वारांत उभा
राहा व हें वचन जाहीर कर: यहूदाचे सर्व लोकहो,
परमेश्वराचें भजनपूजन करण्यासाठीं या द्वारांनीं आंत
जातां ते सर्व तुम्ही परमेश्वराचें वचन ऐका. ३ सेनाधीश
परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, आपले मार्ग व आपली
कृति सुधारा, म्हणजे या स्थळीं मी तुमची वस्ती
करवीन. ४ हें परमेश्वराचें मंदिर, हें परमेश्वराचें मंदिर,
हें परमेश्वराचें मंदिर असें बोलून लटक्या भाषणावर
भिस्त ठेवूं नका. ५ जर तुम्ही आपले मार्ग व आपली
कृति पूर्णपणें सुधाराल; माणसामाणसांत खरा न्याय
कराल; ६ परका, पोरका व विधवा यांस जाचणार
नाहीं; या स्थळीं निर्दोष रक्त पाडणार नाहीं; आणि अन्य
दैवतांचें अनुसरण करून आपली हानि करून घेणार
नाहीं: ७ तर जो देश, जें स्थल तुमच्या पूर्वजांस मीं
युगानुयुग दिलें आहे त्यांत तुमची वस्ती होईल असें
मी करीन. ८ पाहा, ज्यापासून कांहीं लाभ नाहीं
असल्या लटक्या वचनांवर तुम्ही श्रद्धा ठेवितां. ९ हें
काय ? तुम्ही चोरी, खून, व्यभिचार करितां, खोटी
शपथ वाहतां, बालाच्या मूर्तीस धूप दाखवितां व ज्यांस
तुम्ही ओळखीत नाहीं अशा अन्य देवांच्या मागें लागतां,
१० आणि मग येऊन ज्या मंदिरास मीं आपलें नाम दिलें
आहे त्यांत माझ्यासमोर उभे राहतां, व आमची मुक्ति
झाली आहे म्हणून हीं सर्व अमंगल कृत्यें करावयास
आम्हांस हरकत नाहीं, असें मनांत म्हणतां. ११ माझें
नाम दिलेलें हें मंदिर तुमच्या दृष्टीनें लुटारूंची गुहा
झालें आहे काय ? पाहा, हें माझ्या लक्षांत येऊन
चुकलें आहे असें परमेश्वर म्हणतो. १२ तर ज्या
स्थळीं माझें नाम राहावें असें मीं प्रथम योजिलें होतें
त्या शिलोस जा व माझे लोक इस्राएल यांच्या दुष्टतेमुळें
मीं त्यांचें काय केलें तें पाहा. १३ परमेश्वर म्हणतो,
तुम्हीं हीं सर्व कृत्यें केलीं, मी तुम्हांशीं मोठ्या निकडीनें
बोलत असतां तुम्हीं माझें ऐकलें नाहीं; मी तुम्हांस
हाक मारीत असतां तुम्हीं उत्तर दिलें नाहीं; १४ म्हणून
ज्याला माझें नाम दिलें आहे व ज्यावर तुमची श्रद्धा
आहे त्या या मंदिराचें आणि तुम्हांस व तुमच्या
पूर्वजांस मीं दिलेल्या या स्थळाचें, शिलोचें केलें तसें,
करीन; १५ आणि तुमचे सर्व भाऊबंद, एफाइमाचें
सर्व संतान यांस घालवून दिलें त्याप्रमाणें मी तुम्हांस
मजसमोरून घालवून देईन.

१६ याकरितां तूं या लोकांसाठीं प्रार्थना करूं नको,
आरोळी व विनंति करूं नको, मजजवळ मध्यस्थी करूं
नको; कारण मी ऐकावयाचा नाहीं. १७ यहूदाच्या
नगरांत, यरुशलेमाच्या रस्त्यांत ते काय करितात तें तूं

[1] अथवा: टेहळणीचा बुरूज

पाहतोस ना ? १८ मुलेंबाळें फाटीं जमा करितात, वडील
माणसें अग्नि पेटवितात, आणि आकाशराणीप्रीत्यर्थ
पोळ्या कराव्या व अन्य देवांस पेयार्पणें द्यावीं म्हणून
स्त्रिया कणीक तिंबितात, असे ते मला क्रोधास पेट-
वितात. १९ परमेश्वर म्हणतो, ते मला संताप आणि-
तात किंवा स्वतांला संताप करून घेऊन आपलें तोंड
काळें करितात ? २० याकरितां प्रभु परमेश्वर म्हणतो,
पाहा, माझा क्रोध व माझा संताप या स्थलावर,
मानवांवर, पशूंवर, शेतांतल्या झाडांवर व भूमीच्या उप-
जावर वर्षेल, तो पेटत राहील, विझणार नाहीं.

२१ सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो,
तुमच्या यज्ञबलींत आपल्या होमबलींची भर घाला
व मांस खात जा. २२ तुमच्या पूर्वजांस मीं मिसर
देशांतून बाहेर आणिलें त्या दिवशीं होमबलींविषयीं
किंवा यज्ञबलींविषयीं मीं त्यांस कांहीं सांगितलें नाहीं व
आज्ञा दिली नाहीं; २३ तर मीं त्यांस एवढीच आज्ञा
केली कीं माझें वचन ऐका, म्हणजे मी तुमचा देव
होईन व तुम्ही माझे लोक व्हाल; तुमचें बरें व्हावें
म्हणून जो सरळ मार्ग मी तुम्हांस सांगतों त्यानें चाला.
२४ तरी पण त्यांनीं ऐकलें नाहीं, आपला कान दिला
नाहीं, ते आपल्या संकल्पाप्रमाणें, आपल्या दुष्ट मनाच्या
हट्टाप्रमाणें चालले, ते मागें गेले, पुढें आले नाहींत.
२५ तुमचे पूर्वज मिसर देशांतून निघाले तेव्हांपासून
आजवर माझे सर्व सेवक जे संदेष्टे त्यांस तुम्हांकडे मी
पाठवीत आलों, त्यांस मोठ्या निकडीनें पाठवीत आलों;
२६ पण त्यांनीं माझें ऐकलें नाहीं, आपला कान दिला
नाहीं; त्यांनीं आपली मान ताठ केली व आपल्या
पूर्वजांपेक्षां अधिक वाईट केलें.

२७ तूं हीं सर्व वचनें त्यांस सांगशील तरी ते
तुझें ऐकणार नाहींत, तूं त्यांस हाक मारिशील पण ते
तुला उत्तर देणार नाहींत. २८ त्यांस असें सांग,
आपला देव परमेश्वर याचा शब्द ऐकत नाहीं व
शिक्षेला मान्य होत नाहीं तें हेंच राष्ट्र आहे; सत्य नष्ट
झालें आहे, तें त्यांच्या मुखांतून नाहीसें झालें आहे.
२९ हे सीयोनकन्ये, आपला केशकलाप काढून
फेकून दे, उजाड डोंगरांच्या शिखरांवर विलाप कर,
कारण आपल्या क्रोधास पात्र झालेल्या या पिढीस
परमेश्वरानें धिक्कारिलें आहे, व टाकून दिलें आहे.
३० कारण यहूदावंशानें माझ्या दृष्टीनें वाईट केलें
आहे; माझें नाम ज्या मंदिरास दिलें आहे तें भ्रष्ट
करण्यासाठीं त्यांनीं आपल्या अमंगळ वस्तु त्यांत
ठेविल्या आहेत, असें परमेश्वर म्हणतो. ३१ आपल्या
पुत्रांचा व आपल्या कन्यांचा अग्नींत होम करण्यासाठीं
बेन-हिन्नोमाच्या खोऱ्यांतील तोफेतांत त्यांनीं उच्चस्थानें
बांधिलीं आहेत; मीं त्यांस असली आज्ञा केली नव्हती;
ती माझ्या मनांतहि आली नव्हती. ३२ यास्तव
परमेश्वर म्हणतो, पाहा, असे दिवस येत आहेत कीं
त्यांत लोक इतःपर त्या स्थलास तोफेत व बेन-हिन्नोमाचें
खोरें म्हणणार नाहींत, तर वधाचें खोरें म्हणतील
आणि जागेच्या संकोचामुळें तोफेतांत प्रेतें पुरितील.
३३ या लोकांचीं प्रेतें आकाशांतल्या पाखरांस व
पृथ्वीवरल्या पशूंस खाद्य होतील, त्यांस कोणी हाकून
लावणार नाहीं. ३४ हर्षाचा व आनंदाचा शब्द,
वराचा व वधूचा शब्द, यहूदाच्या नगरांतून व यरुश-
लेमाच्या रस्त्यांतून बंद पडेल असें मी करीन; कारण
भूमि वैराण होईल.

८ १ परमेश्वर म्हणतो, त्या काळीं यहूदाच्या
राजांच्या अस्थि, त्यांच्या सरदारांच्या अस्थि,
याजकांच्या अस्थि, संदेष्ट्यांच्या अस्थि व यरुशलेम-
करांच्या अस्थि त्यांच्या कबरांतून बाहेर काढितील.
२ त्या ते सूर्य, चंद्र व आकाशांतील सर्व नक्षत्रगण
यांपुढें पसरितील; त्यांची तर त्यांनीं आवड धरिली,
त्यांची सेवा केली, त्यांच्यामागें ते चालले, त्यांचा
त्यांनीं धावा केला व त्यांचें भजनपूजन केलें; त्या अस्थि
गोळा करून पुरणार नाहींत तर त्या भूतलावर खत
होतील. ३ या दुष्ट वंशाचे अवशिष्ट राहिलेले ज्या ज्या
स्थळीं मीं हाकून लाविलें त्या त्या स्थळीं जे बाकी
उरतील ते जीवनाऐवजीं मरण पसंत करितील, असें
सेनाधीश परमेश्वर म्हणतो.

४ परमेश्वर म्हणतो, आणखी त्यांस सांग, कोणी

पडला तर पुनः उठत नाहीं काय ? कोणी बहकला
तर पुनः वळत नाहीं काय ? ५ तर हे यरुशलेमकर
एकसारखे कां बहकत राहिले आहेत ? ते कपटाला
चिकटून राहिले आहेत, ते वळावयास कबूल होत
नाहींत. ६ मीं कान देऊन ऐकलें तों ते ठीक बोलत
नाहींत; त्यांच्या दुष्टतेचा त्यांस पश्चात्ताप होत नाहीं;
मीं हें काय केलें असें कोणी म्हणत नाहीं; घोडा
रणांत धाव घेतो तसे ते सर्व उलटून आपल्या मार्गावर
जातात. ७ आकाशांतील करकोची आपला नेमिलेला
समय जाणते; होला, निळवी व सारस आपल्या
येण्याच्या वेळेचें स्मरण ठेवितात; पण माझे लोक
परमेश्वराचा निर्णय ओळखीत नाहींत. ८ आम्ही सुज्ञ
आहों, परमेश्वराचें धर्मशास्त्र आम्हांजवळ आहे,
असें तुम्ही कसें म्हणतां ? परंतु पाहा, लेखकांच्या
लबाड लेखणीनें तें खास खोटें केलें आहे. ९ शहाणे
लज्जित होतात, त्यांची मेधा उडून ते पकडले जातात;
पाहा, परमेश्वराचें वचन ते धिक्कारितात; त्यांच्यांत
शहाणपण कोठचें असणार ! १० यामुळें मी त्यांच्या
स्त्रिया इतरांस देईन; त्यांचीं शेतें नव्या वहिवाटदारांस
देईन; कारण लहानापासून थोरापर्यंत ते झाडून सर्व
लोभवश झाले आहेत; संदेष्ट्यापासून याजकापर्यंत ते
सर्व कपट करितात. ११ शांतीचें नांव असतां शांति,
शांति असें म्हणून माझ्या लोकांच्या कन्येचा घाय ते
वरवर बरा करितात. १२ त्यांनीं अमंगळ कृत्य केलें
त्याची त्यांस लाज वाटली काय ? नाहीं; त्यांस लाज
बिलकूल वाटली नाहीं; शरम कसली ती त्यांस ठाऊक
नाहीं; म्हणून पतन पावणाऱ्यांबरोबर ते पतन
पावतील; मी त्यांचा समाचार घेईन तेव्हां ते ठोकर
खाऊन पडतील, असें परमेश्वर म्हणतो. १३ परमेश्वर
म्हणतो, मी त्यांचा अगदीं नायनाट करीन; द्राक्षलतेवर
द्राक्षें, अंजिराच्या झाडांवर अंजीर नसतील; पानेंहि
वाळून जातील; म्हणून त्यांस पायांनीं तुडवितील अशांस
मी नेमीन. १४ आपण स्वस्थ कां बसलों आहों ? जमा
व्हा, चला, आपण तटबंदीच्या नगरांत शिरूं व तेथें नष्ट
होऊं; कारण आम्हीं परमेश्वराविरुद्ध पाप केलें आहे म्हणून
परमेश्वर आमचा देव यानें आम्हीं नाश पावावा असें
ठरविलें आहे व विषाचें पाणी आम्हांस प्यावयास दिलें
आहे. १५ आम्ही शांतीची अपेक्षा करितों पण कांहीं
हित होत नाहीं; घाय बरा होण्याची वाट पाहतों, पण
पाहा, दहशतच उभी. १६ त्याच्या घोड्यांचें फुरफुरणें
दानांतील नगरांतून ऐकूं येतें; त्याच्या वारूंच्या मोठ्या
खिंकाळण्यांनीं सर्व भूमि हादरत आहे; ते येऊन देश
व त्यांतील सर्वस्व, नगर व त्यांतील रहिवासी यांस
ग्रासून टाकितात. १७ कारण पाहा, मी तुमच्यांत सर्प
व नाग पाठवीन, त्यांवर मंत्रतंत्र चालावयाचे नाहींत,
ते तुम्हांस दंश करितील; असें परमेश्वर म्हणतो.

१८ हाय हाय ! माझ्या दुःखाचें सांत्वन मला
करितां आलें असतें तर बरें होतें ! माझें हृदय
माझ्या ठायीं म्लान झालें आहे. १९ पाहा, दूर देशांतून
माझ्या लोकांच्या कन्येची आरोळी ऐकूं येते कीं
सीयोनांत परमेश्वर नाहीं ना ? त्यांत तिचा राजा नाहीं
ना ? त्यांनीं आपल्या मूर्तींनीं व परक्या खोट्या दैवतांनीं
मला कां चिडविलें आहे ? २० सुगी सरली, हंगाम
आटोपला, पण आमचें तारण झालें नाहीं. २१ माझ्या
लोकांच्या कन्येच्या घायानें मी घायाळ झालों
आहें; मी सुतकी आहें; महाभयानें मला घेरिलें
आहे. २२ गिलादांत मलम नाहीं काय ? तेथें
कोणी वैद्य नाहीं काय ? माझ्या लोकांच्या कन्येचे
पाय कां बरे झाले नाहींत ?

९ १ अहाहा ! माझें मस्तक जलसंचय, माझे डोळे
अश्रूंचा झरा असते तर किती बरें होतें ! म्हणजे
माझ्या लोकांच्या कन्येच्या वध पावलेल्यांबद्दल मी
रात्रंदिवस अश्रुपात केला असता. २ मला वनांत वाट-
सरूंच्यासारखें बिऱ्हाड असतें तर किती बरें होतें ? म्हणजे
मी आपल्या लोकांचा त्याग केला असता, त्यांजपासून
निघून गेलों असतों; कारण ते सर्व व्यभिचारी, बेइमान्यांचा
जमाव आहेत. ३ खोटें बोलण्यास ते आपली जीभ
धनुष्याप्रमाणें वाकवितात; ते देशांत प्रबळ झाले आहेत;
पण सत्यासाठीं नव्हे, तर दुष्कर्माला दुष्कर्म ते जोडितात;
मला ते ओळखीत नाहींत, असें परमेश्वर म्हणतो.

४ आपआपल्या शेजाऱ्याविषयीं सावध असा, कोणाहि
बंधूचा विश्वास धरूं नका; कारण प्रत्येक बंधु खास
ठकवितो, प्रत्येक शेजारी चहाड्या करीत फिरतो.
५ जो तो आपल्या शेजाऱ्याला फसवितो; ते सत्य
म्हणून बोलत नाहींत; त्यांनीं आपल्या जिभेस खोटें
बोलण्यास शिकविलें आहे; ते कुटिलाचार करण्यासाठीं
स्वतांस शिणवितात. ६ कपटानें घेरिलेली अशी तुझी
वस्ती आहे; कपटामुळें ते मला ओळखण्यास अमान्य
आहेत, असें परमेश्वर म्हणतो.

७ यासाठीं सेनाधीश परमेश्वर म्हणतो, पाहा, मी
त्यांस गाळून पारखीन; माझ्या लोकांच्या कन्येच्या
वर्तनास्तव मी दुसरें काय करणार ? ८ त्यांची जीभ
प्राणहारक बाण आहे; ते असत्य बोलतात; ते तोंडानें
शेजाऱ्यांशीं सलोख्याचें भाषण करितात, पण अंतर्यामीं
त्यांवर टपून असतात. ९ परमेश्वर म्हणतो, याबद्दल
मी त्यांचा समाचार घेणार नाहीं काय ? माझा आत्मा
या राष्ट्राचें पारिपत्य करणार नाहीं काय ?

१० मी पर्वतांविषयीं आक्रंदन करीन, विलाप
करीन, रानांतल्या कुरणांबद्दल शोक करीन;
कारण तीं जळून खाक झालीं आहेत; त्यांवरून कोणी
चालत नाहींत; तेथें कोणाला गुरांढोरांचा शब्द ऐकूं
येत नाहीं; जनावरें पळालीं आहेत, आकाशांतील
पक्षी निघून गेले आहेत. ११ यरुशलेम ढिगार,
कोल्ह्यांचें वसतिस्थान असें मी करीन; यहूदाचीं नगरें
ओसाड, निर्जन करीन. १२ हें समजून घेईल असा
शहाणा कोण आहे ? परमेश्वराच्या मुखानें त्याला
सांगितलें असून तें इतरांस कळवील असा कोण आहे ?
देशाचा नाश कां झाला ? कोणी त्यांतून येतजात
नाहीं, असा तो जळून वैराणासारखा कां झाला ?

१३ परमेश्वर म्हणतो, मीं त्यांच्यापुढें ठेविलेलें माझें
धर्मशास्त्र त्यांनीं सोडिलें, त्यांनीं माझा शब्द ऐकला
नाहीं व त्याप्रमाणें ते चालले नाहींत; १४ तर ते
आपल्या हृदयाच्या हट्टाप्रमाणें चालले, त्यांच्या पूर्वजांनीं
त्यांस शिकविल्याप्रमाणें ते बालमूर्तींच्या मागें लागले.
१५ यास्तव सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो,
पाहा, मी या लोकांस कडू दवणा चारीन, त्यांस विषाचें
पाणी पाजीन, १६ आणि जीं राष्ट्रें त्यांस व त्यांच्या
पूर्वजांस माहीत नव्हतीं त्यांच्यामध्यें त्यांची दाणादाण
करीन; त्यांस नष्ट करीपर्यंत तरवार त्यांच्या पाठीस लावीन.

१७ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, विचार करा,
मोलानें ऊर बडविणाऱ्या स्त्रियांस बोलावून आणा,
कुशल स्त्रियांस आमंत्रण करा; १८ त्यांनीं त्वरा करून
आम्हांसाठीं शोकगीत म्हणावें म्हणजे आमच्या नेत्रांतून
अश्रु गळतील, आमच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा
वाहतील. १९ कारण सीयोनांतून आक्रंदनाचा शब्द
ऐकूं येत आहे: आम्हांस कसें नागविलें ! आमची
कशी फजिती उडाली आहे ! आम्हीं देश त्यागिला
आहे, कारण त्यांनीं आमचीं घरें पाडिलीं आहेत.

२० स्त्रियांनो, परमेश्वराचें वचन ऐका,
त्याच्या तोंडचे शब्द तुमचे कान स्वीकारोत;
तुम्ही आपल्या कन्यांस विलापगीत शिकवा,
एकमेकींस शोकगीत शिकवा.

२१ कारण रस्त्यांतलीं मुलें व चौकांतील तरुण
नष्ट करण्यास
मृत्यु आमच्या खिडक्यांतून आंत शिरला आहे,
त्यानें आमच्या वाड्यांत प्रवेश केला आहे.

२२ शेतांत खत पडतें,
कापणाऱ्याच्या मागें पेंढी गळून पडते,
कोणी उचलीत नाहीं,
तशीं माणसांचीं मढीं पडतील;
असें परमेश्वर म्हणतो, हें सांग.

२३ परमेश्वर म्हणतो, ज्ञान्यानें आपल्या ज्ञानाचा
अभिमान बाळगूं नये; बलवानानें आपल्या बलाचा
व श्रीमंतानें आपल्या श्रीमंतीचा अभिमान बाळगूं
नये; २४ बाळगावयाचा असला तर, मी दया
करणारा व पृथ्वीवर धर्म व न्याय चालविणारा परमे-
श्वर आहें, याची त्याला जाणीव आहे, ओळख आहे,
याच्याविषयीं बाळगावा; यांत मला संतोष आहे, असें
परमेश्वर म्हणतो. २५ परमेश्वर म्हणतो, पाहा, असे
दिवस येत आहेत कीं सुंती, पण वास्तविक बेसुनत

अशा सर्व लोकांला मी शासन करीन; २६ मिसर,
यहूदा, अदोम, अम्मोनी, मवाबी व आपल्या केसांची
चोंच काढणारे रानांतले रहिवासी या सर्वांला मी
शासन करीन; कारण सर्व राष्ट्रें बेसुनत आहेत व
इस्राएलाचें सर्व घराणें हृदयानें बेसुनत आहे.

१ हे इस्राएलाच्या घराण्या, परमेश्वर तुम्हांस
१० जें वचन सांगतो तें ऐका; २ परमेश्वर असें
म्हणतो, राष्ट्रांचे संप्रदाय शिकूं नका; आकाशां-
तील उत्पातांनीं घाबरूं नका; राष्ट्रें तर त्यांनीं
घाबरतात. ३ लोकांचे विधि व्यर्थ आहेत; अरण्यांतून
कोणी तोडून आणिलेलें तें काष्ठच होय, तें कारा-
गिराच्या हातचें कुऱ्हाडीनें केलेलें काम आहे. ४ तो
सोन्यारुप्यानें तें भूषित करितो व हालूं नये म्हणून
हातोड्यानें खिळे ठोकून तें घट्ट बसवितो. ५ त्या
मूर्ति बागेंतल्या बुजगावण्यासारख्या आहेत, त्यांस
बोलतां येत नाहीं; त्या उचलून न्याव्या लागतात,
कारण त्यांस चालतां येत नाहीं; त्यांस भिऊं नका;
कारण त्यांच्यानें कांहीं वाईट करवत नाहीं, व त्यांना
कांहीं बरें करण्याचें सामर्थ्य नाहीं. ६ हे परमेश्वरा,
तुजसारखा कोणीच नाहीं; तूं थोर आहेस, पराक्रमा-
मुळें तुझें नाम मोठें आहे. ७ हे राष्ट्रांच्या राजा,
तुला कोण भिणार नाहीं ? हें तुला साजतें; राष्ट्रांतील
सर्व ज्ञात्यांत, त्यांच्या सर्व राज्यांत तुजसमान कोणीच
नाहीं; ८ ते एकंदर सर्व पशुवत् व मूर्ख आहेत;
मूर्तींपासून घ्यावयाचा बोध म्हटला म्हणजे काष्ठरूप.
९ तार्शीशाहून आणिलेले रुप्याचे पत्रे व उफाजचें सोनें
यांचें कारागिरानें केलेलें, सोनाराच्या हातांनीं घडिलेलें
काम त्या आहेत, त्यांस निळा जांभळा पोशाख चढवितात;
त्या सगळ्या कुशल कारागिरांच्या हातचें काम होत.
१० तरी परमेश्वर सत्य देव आहे; तो जिवंत देव,
सनातन राजा आहे; त्याच्या क्रोधानें पृथ्वी कंपायमान
होते; त्याच्या कोपापुढें राष्ट्रांचा टिकाव लागत नाहीं.
११ तुम्ही त्यांस हें सांगा कीं ज्या देवांनीं आकाश
व पृथ्वी केली नाहीं ते पृथ्वीवरून, आकाशाखालून
नष्ट होतील.

१२ त्यानें पृथ्वी आपल्या सामर्थ्यानें उत्पन्न केली,
त्यानें आपल्या ज्ञानानें विश्व स्थापिलें,
त्यानें आपल्या बुद्धीनें आकाश पसरिलें.
१३ तो आपला शब्द उच्चारितो तों आकाशांत
पाण्याचा गडगडाट होतो;
तो पृथ्वीच्या दिगंतापासून वाफेचे लोट
वर चढवितो;
तो पावसासाठीं विजा सिद्ध करितो
आणि आपल्या भांडारांतून वायु बाहेर काढितो.
१४ प्रत्येक मनुष्य पशुतुल्य व ज्ञानशून्य झाला आहे;
प्रत्येक मूर्तिकार मूर्तीमुळें लज्जित झाला आहे;
कारण त्यानें ओतलेली मूर्ति साक्षात् लबाडी आहे,
त्यांच्यांत मुळींच प्राण नाहीं.
१५ त्या शून्य, उपहासाला पात्र वस्तु होत;
त्यांचा समाचार घेऊं लागतांच त्या नष्ट होतात.
१६ जो याकोबाचा वांटा तो त्यांसारिखा नव्हे,
तर तो सर्वांचा निर्माणकर्ता आहे
व इस्राएल त्याच्या वतनाचा वंश आहे;
सेनाधीश परमेश्वर हें त्याचें नाम आहे.

१७ हे वेढ्यांत सांपडलेल्ये, तूं आपलें गाठोडें
गुंडाळून या भूमीवरून नीघ. १८ कारण परमेश्वर
म्हणतो, पाहा, मी या प्रसंगीं या देशचे रहिवासी
गोफणून टाकितों, मी त्यांस अशी पीडा करितों कीं
ती त्यांस जाणवेल. १९ हाय हाय ! मला जखम झाली
आहे, मला लागलेला मार भारी आहे ! तरी मला वाटतें,
हें दुःख माझ्या वांट्याला आलें आहे म्हणून मला तें
सोसलें पाहिजे. २० माझा डेरा लुटला आहे, माझे सर्व
दोर तुटले आहेत; माझे पुत्र निघून गेले आहेत; ते
नाहींत; माझा डेरा ताणावयाला कोणी नाहीं, माझ्या
कनाती लावावयाला कोणी नाहीं. २१ कारण मेंढपाळ
पशुतुल्य झाले आहेत; ते परमेश्वराच्या शोधास लागले
नाहींत म्हणून त्यांची कार्यसिद्धि झाली नाहीं, त्यांचा
सर्व कळप विखरून गेला आहे. २२ ऐका ! अवाई
ऐका ! पाहा, ती येत आहे, उत्तर देशांतून मोठी गर्दी
येत आहे. ती यहूदाचीं नगरें वैराण, कोल्ह्यांची

राहण्याची जागा अशी करून सोडील. २३ हे
परमेश्वरा, मला ठाऊक आहे कीं मनुष्याचा मार्ग त्याच्या
हातीं नाहीं, पावलें नीट टाकणें हें चालणाऱ्या
मनुष्याच्या हातीं नाहीं. २४ हे परमेश्वरा, मला शिक्षा
कर, पण ती न्यायानें कर, तुझ्या कोपानें नको; नाहीं तर
तूं मला शून्यवत् करिशील. २५ जीं राष्ट्रें तुला ओळखीत
नाहींत, ज्या जाती तुझ्या नामाचा धावा करीत नाहींत
त्यांवर तूं आपल्या संतापाचा मारा कर. कारण त्यांनीं
याकोबास ग्रासून टाकिलें आहे, त्याला खाऊन टाकिलें
आहे, त्याचें वसतिस्थान उद्ध्वस्त केलें आहे.

**११** १ परमेश्वराकडून यिर्मयाला वचन प्राप्त
झालें तें हें: २ तुम्ही ह्या कराराचीं वचनें
ऐका; यहूदाचे लोक व यरुशलेमकर यांच्याशीं
बोला. ३ तूं त्यांस सांग, परमेश्वर इस्राएलाचा देव
म्हणतो, या कराराचीं वचनें जो ऐकत नाहीं तो शापित
आहे. ४ ज्या दिवशीं मीं तुमच्या पूर्वजांस मिसर
देशांतून, लोखंडी भट्टींतून, बाहेर काढिलें त्या दिवशीं
हा करार मीं त्यांस आज्ञापिला व म्हटलें, माझी वाणी
ऐका व माझ्या आज्ञेप्रमाणें सगळीं वचनें पाळा,
म्हणजे तुम्ही माझे लोक व्हाल व मी तुमचा देव
होईन; ५ आणि ज्यांत दुधामधाचे प्रवाह वाहत आहेत
असा देश, आज आहे तसा, तुमच्या पूर्वजांस मीं
शपथपूर्वक देऊं केला, ती शपथ मी पूर्ण करीन.
तेव्हां मीं उत्तर देऊन म्हटलें; हे परमेश्वरा, आमेन.

६ परमेश्वर मला म्हणाला, यहूदाच्या नगरांत व
यरुशलेमाच्या रस्त्यांत हीं सर्व वचनें पुकारून सांग:
या कराराचीं वचनें ऐका व त्याप्रमाणें वागा. ७ मीं
तुमच्या पूर्वजांस मिसर देशांतून बाहेर आणिलें त्या
दिवसापासून आजवर मी त्यांस बजावून सांगत
आलों आहें, नित्य मोठ्या निकडीनें बजावीत आलों
आहें कीं माझा शब्द ऐका; ८ पण ते ऐकेनात,
आपला कान लावीनात, तर आपल्या दुष्ट मनाच्या
हट्टाप्रमाणें ते चालत गेले; मीं त्यांस या कराराचीं
वचनें पाळण्यास सांगितलें असून त्यांनीं तीं पाळिलीं
नाहींत, म्हणून त्या करारांत सांगितलेलें सर्व मीं
त्यांजवर आणिलें.

९ परमेश्वर मला म्हणाला, यहूदांतील मनुष्यें व
यरुशलेमकर यांचा कट झालेला उघडकीस आला
आहे. १० त्यांच्या वडिलांनीं माझ्या वचनांकडे कान
देण्याचें नाकारिलें, त्याच त्यांच्या दुष्कर्मांला ते फिरून
अनुसरले आहेत; अन्य देवांची सेवा करण्यास
ते त्यांच्यामागें लागले आहेत; इस्राएलाचें घराणें व
यहूदाचें घराणें यांनीं, त्यांच्या पूर्वजांशीं मीं केलेला
करार मोडिला आहे. ११ यास्तव परमेश्वर म्हणतो,
पाहा, मी त्यांजवर अरिष्ट आणितों त्यांतून त्यांचा
निभाव लागणार नाहीं; ते मला आरोळी मारितील तरी
मी त्यांचें ऐकणार नाहीं. १२ यहूदाचीं नगरें व
यरुशलेमकर ज्या दैवतांस धूप जाळितात त्यांकडे ते
जाऊन आरोळी मारितील; पण संकटसमयीं तीं त्यांचें
रक्षण मुळींच करणार नाहींत. १३ हे यहूदा, तुझ्या
नगरांइतकी तुझ्या दैवतांची संख्या आहे; यरुशलेमांत
जितके रस्ते आहेत तितक्या वेद्या, त्या लाजिरवाण्या वस्तू-
साठीं म्हणजे अर्थात् बालमूर्तीपुढें धूप जाळण्यासाठीं तुम्हीं
मांडिल्या आहेत. १४ याकरितां तूं या राष्ट्रांसाठीं
प्रार्थना करूं नको, त्यांच्यासाठीं विनंती करूं नको
कीं धावा करूं नको; कारण ते आपल्या संकटसमयीं
मला हाक मारितील तेव्हां मी ऐकणार नाहीं.

१५ मजशीं कपटानें वागणाऱ्या माझ्या प्रियेचें
माझ्या मंदिरांत काय काम? नवसांनीं व पवित्र मांस
अर्पिल्यानें तुजवरचें संकट टळेल काय? टळत
असेल तर आनंद कर. १६ परमेश्वरानें तुला चांगल्या
फळांनीं शोभिवंत असलेलें हिरवें जैतून झाड हें
नांव दिलें, पण मोठी गर्जना करून त्यानें त्याला
आग लाविली व त्याच्या फांद्या मोडिल्या. १७ इस्रा-
एलाचें घराणें व यहूदाचें घराणें यांनीं बालमूर्तीस
धूप जाळून मला चिडविण्याचें दुष्कर्म केलें, म्हणून ज्या
सेनाधीश परमेश्वरानें तुला लाविलें त्यानें तुला अरिष्टाची
शिक्षा सांगितली आहे.

१८ परमेश्वरानें मला तें कळविलें; व मला तें कळलें

तेव्हां तूं मला त्यांचीं कर्मे दाखविलीं. १९ मी तर
सौम्य कोकरासारखा होतों; मला न कळतां ते वधावयास
नेत होते; ह्या झाडाचा आपण फळासकट नाश करूं
व त्याच्या नांवाचें स्मरण पुनः होऊं नये म्हणून त्यास
जीवंतांच्या भूमीवरून नाहींसें करूं, असा त्यांचा मज-
विरुद्ध कट चालला होता. २० तथापि हे सत्य न्याय
करणाऱ्या, अंतर्याम व हृदय पारखणाऱ्या, सेनाधीश
परमेश्वरा, त्यांचा तूं सूड घेशील तो मला पाहूं दे,
कारण मीं आपली फिर्याद तुजपुढें मांडिली आहे.
२१ अनाथोथचे जे लोक माझ्या जिवावर टपले
असून म्हणतात कीं तूं परमेश्वराच्या नामानें संदेश देऊं
नको, देशील तर आमच्या हातून मरशील, त्यांच्या-
विरुद्ध परमेश्वर बोलला आहे, २२ सेनाधीश परमेश्वर
असें म्हणतो, पाहा, त्यांस मी शिक्षा करीन; त्यांचे
तरुण तरवारीनें मरतील, त्यांचे पुत्र व कन्या
दुष्काळानें फस्त होतील. २३ त्यांतला कोणी शेष
उरणार नाहीं, कारण अनाथोथकरांवर मी अरिष्ट,
त्यांची खबर घेण्याचा वर्षकाळ, आणितों.

१२ १ परमेश्वरा, मीं तुजशीं वाद घालूं लागलों
तर तूं न्यायीच ठरशील; तरी मी तुजशीं असा
वाद करितों कीं दुष्टांचा मार्ग कां सफळ होतो?
बेइमानी करणाऱ्या सर्वांस सुखसमाधान कां होतें?
२ तूं त्यांस लाविलें आहे, त्यांनीं मूळ धरिलें आहे; तें
वाढून त्यांस फळें येतात; तूं त्यांच्याजवळ त्यांच्या
मुखांत असतोस पण त्यांच्या अंतर्यामापासून तूं दूर
असतोस. ३ तथापि हे परमेश्वरा, तूं मला जाणतोस,
मला पाहतोस, तुजविषयीं माझें हृदय कसें आहे हें तूं
पारखितोस; वधावयास न्यावयाच्या मेंढरासारखें त्यांस
बाहेर काढ; वधाच्या दिवसासाठीं त्यांस सिद्ध कर.
४ देशानें कोठवर शोक करावा? सर्व देशांतली वन-
स्पति कोठवर सुकणार? त्यांत वस्ती करणाऱ्यांच्या
दुष्टतेनें पशुपक्षी नष्ट झाले आहेत, कारण ते म्हणतात,
आमचा अंत तो पाहणार नाहीं. ५ तूं पायीं चालणाऱ्यां-
बरोबर धावतांना थकलास तर घोडेस्वारांबरोबर
कसा टिकशील? शांततेच्या देशांत तूं निर्भय आहेस,
पण यार्देनेच्या घोर अरण्यांत तूं काय करिशील?
६ कारण तुझे भाऊबंद, तुझ्या बापाचें घराणें हीं देखील
तुजशीं बेइमानपणें वागलीं आहेत; त्यांनीं देखील
तुजवर शब्दांचा भडिमार केला आहे; तीं तुजशीं गोड
बोललीं तरी त्यांचा विश्वास धरूं नको.

७ मीं आपल्या घराचा त्याग केला आहे, मीं
आपलें वतन टाकून दिलें आहे; मीं आपल्या प्राण-
प्रियेस तिच्या शत्रूंच्या हातीं दिलें आहे. ८ माझें वतन
मला वनांतल्या सिंहाप्रमाणें झालें आहे; तिनें आपला
शब्द मजविरुद्ध उच्चारिला आहे, म्हणून मीं तिचा द्वेष
केला आहे. ९ माझें वतन मला चित्रविचित्र रंगांच्या
गिधाडाप्रमाणें आहे काय? तिला गिधाडांनीं घेरिलें
काय? चला, वनांतले सर्व पशु जमवा, तिला खाऊन
टाकण्यास त्यांस आणा. १० बहुत मेंढपाळांनीं माझ्या
द्राक्षीच्या मळ्याची नासाडी केली आहे, त्यांनीं माझें
वतन पायाखालीं तुडविलें आहे, त्यांनीं माझें रम्य
वतन शुष्क जंगल केलें आहे. ११ त्यांनीं तें
ओसाड केलें आहे; तें ओसाड होऊन मजपुढें विलाप
करीत आहे; सगळा देश ओसाड झाला आहे, कारण
कोणालाहि त्याची पर्वा वाटली नाहीं. १२ वैराणांतील
सर्व उजाड टेकड्यांवर लुटारू आले आहेत; कारण
परमेश्वराची तरवार या टोकापासून त्या टोकापर्यंत
देश ग्रासून टाकीत आहे; कोणत्याहि मानवी प्राण्यास
चैन नाहीं. १३ त्यांनीं गहूं पेरिला आणि कापणी
कांटेऱ्यांची केली; त्यांनीं कष्ट केले पण कांहीं फायदा
झाला नाहीं; परमेश्वराच्या तीव्र कोपामुळें तुमचा
आपल्या उपजासंबंधानें फजिती होईल.

१४ माझे लोक इस्राएल यांस मीं दिलेल्या वतनास
जे माझे दुष्ट शेजारी हात लावितात त्या सर्वांविरुद्ध
परमेश्वर असें म्हणतो, पाहा, मी त्यांस त्यांच्या देशां-
तून उपटून टाकीन आणि त्यांच्यामधून यहूदाचें
घराणें उपटून टाकीन. १५ तरी त्यांस उपटून
टाकिल्यावर मी त्यांजवर पुनरपि दया करीन, व
त्यांतल्या प्रत्येकास ज्याच्या त्याच्या वतनांत व

१ अथवा: महापुरांत

जमिनीत परत आणीन. १६ ते जर माझ्या
लोकांच्या चालीरिती मन लावून शिकतील म्हणजे
अर्थात् त्यांनीं माझ्या लोकांस ज्याप्रमाणें बालमूर्तीची शपथ
घेण्यास शिकविलें त्याप्रमाणें परमेश्वराच्या जीविताची,
माझ्या नामाची, शपथ वाहावयास शिकतील तर ते
माझ्या लोकांमध्यें वसतील; १७ पण ते माझें ऐकणार
नाहींत तर असलें राष्ट्र मी समूळ उपटून टाकीन; तें
उपटून त्याचा नाश करीन, असें परमेश्वर म्हणतो.

**१३** १ परमेश्वरानें मला सांगितलें, तूं जाऊन
आपणासाठीं तागाचा कमरबंद विकत घे, तो
कमरेस गुंडाळ पण त्याला पाणी लागूं देऊं
नको. २ तेव्हां परमेश्वराच्या सांगण्याप्रमाणें मीं
कमरबंद विकत घेऊन कमरेस गुंडाळिला. ३ मग
परमेश्वराचें वचन दुसऱ्यानें मला प्राप्त झालें कीं ४ तूं
विकत घेतलेला तुझ्या कमरेस असलेला कमरबंद
घे, ऊठ, फरात नदीकडे जा व तो तेथें खडकाच्या
कपारींत लपवून ठेव. ५ मीं परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें
जाऊन तो फरात नदीजवळ लपवून ठेविला. ६ बरेच
दिवस लोटल्यावर परमेश्वर मला म्हणाला, ऊठ, फरात
नदीकडे जा व जो कमरबंद तेथें लपवून ठेवण्यास
तुला मीं सांगितलें होतें तो घेऊन ये. ७ तेव्हां मी
फरात नदीकडे गेलों व कमरबंद जेथें लपवून ठेविला
होता तेथून तो खणून काढिला आणि पाहतो तों कमर-
बंद खराब, कुचकामाचा झाला होता. ८ तेव्हां परमे-
श्वराचें वचन मला प्राप्त झालें; ९ परमेश्वर असें म्हणतो,
असाच मी यहूदाचा दिमाख, यरुशलेमाचा मोठा
दिमाख नष्ट करीन. १० ते दुष्ट लोक माझीं वचनें
ऐकत नाहींत, ते आपल्या अंतःकरणाच्या हट्टाप्रमाणें
चालतात आणि अन्य देवांची सेवा करण्यास व त्यांस
भजण्यास त्यांच्या मागें जातात म्हणून त्यांची गति या
निरुपयोगी झालेल्या कमरबंदाप्रमाणें होईल. ११ इस्रा-
एलाचें सर्व घराणें व यहूदाचें सर्व घराणें ह्यांनीं माझी
प्रजा व्हावें, आणि माझें नाम, स्तुति व भूषण यांस
कारण व्हावें म्हणून, कमरबंद जसा मनुष्याच्या कमरेस
लगटलेला असतो तसें त्यांनीं मला लगटून राहावें असें
मीं केलें, तरी त्यांनीं मानिलें नाहीं, असें परमेश्वर
म्हणतो. १२ यास्तव त्यांस हें वचन सांग: परमेश्वर
इस्राएलाचा देव म्हणतो, प्रत्येक सुरई द्राक्षारसानें भर-
लेली आहे; ते तुला म्हणतील, प्रत्येक सुरई द्राक्षारसानें
भरलेली आहे हें आम्हांस ठाऊक नाहीं काय ?
१३ तेव्हां त्यांस तूं सांग, पाहा, परमेश्वर म्हणतो, मी
या देशचे सर्व रहिवासी म्हणजे दाविदाच्या गादीवर
बसणारे राजे, याजक, संदेष्टे व सर्व यरुशलेमनिवासी
यांस मद्यानें मस्त करीन. १४ त्यांस मी एकमेकांवर
आदळीन, बाप व मुलें हीं मी एकमेकांवर आदळीन;
मी त्यांची गय करणार नाहीं, त्यांच्यावर दयामाया
करणार नाहीं; त्यांचा नाश केल्यावांचून राहणार नाहीं
असें परमेश्वर म्हणतो.

१५ तुम्ही ऐका, कान द्या ! गर्विष्ठ होऊं नका,
कारण परमेश्वर हें बोलला आहे. १६ परमेश्वर तुमचा
देव अंधकार पाडील, अंधकारमय डोंगरांवर तुमचे
पाय ठेचा खातील, तुम्ही उजेडाची अपेक्षा करीत
असतां उजेड पालटून तो मृत्युच्छाया व काळोख
करील, त्यापूर्वी त्याला थोर माना; १७ पण तुम्ही
ऐकणार नाहीं तर तुमच्या गर्वामुळें माझें हृदय एकांतीं
शोकाकुल होईल; परमेश्वराच्या कळपाचा पाडाव होतो
म्हणून मी रडेन, माझ्या डोळ्यांतून टपटप आसवें
गळतील. १८ राजास व राजमातेस सांग, आसना-
वरून खालीं बसा; कारण तुमच्या वैभवाचा मुकुट
तुमच्या शिरावरून खालीं पडत आहे. १९ दक्षिणेंतील
नगरें बंद पडलीं आहेत, तीं उघडावयास कोणी
नाहीं; यहूदाला सर्वस्वीं बंदिवान करून नेलें आहे,
तो पूर्णपणें बंदिवान झाला आहे.

२० उत्तरेकडून जे येत आहेत त्यांस नजर वर करून
पाहा ! तुला दिलेला कळप, तुझा रम्य कळप कोठें
आहे ? २१ ज्यांचा स्नेह संपादन करण्याचा प्रयत्न तूं
केला त्यांस त्यानें तुझ्या शिरावर ठेविलें तर तूं काय
म्हणशील ? प्रसववेदना लागलेल्या स्त्रीप्रमाणें तुला
क्लेश होणार नाहींत काय ? २२ हें मजवर कां आलें

असें आपल्या मनांत म्हणशील तर तुझ्या मनस्वी
दुष्कर्मांमुळें तुझ्या अंगावरील वस्त्राचा पदर सारिला आहे
व तुझ्या टाचा जबरीनें उघड्या केल्या आहेत.
२३ कूशीला आपली कातडी, चित्त्याला आपले ठिपके
पालटतां येतील काय? असें घडेल तरच दुष्टतेला
सवकलेल्या तुम्हांस चांगलें आचरण करितां येईल.
२४ यास्तव रानांतल्या वाऱ्यापुढें भूस उडतें तसें मी
त्यांस उडवीन. २५ परमेश्वर म्हणतो, हा तुझा वांटा,
मजकडून तुला मापून दिलेला वतनभाग आहे; कारण
तूं मला विसरलीस व खोट्यावर भरंवसा ठेविलास;
२६ म्हणून मी तुझें नेसण तुझ्या तोंडावर उडवीन म्हणजे
तुझी लज्जा दिसेल. २७ तुझे व्यभिचार, तुझें खिदळणें,
तुझ्या जारकर्माचे चाळे, हीं तुझीं घोर कर्में मीं त्या
मैदानांतल्या टेकड्यांवर पाहिलीं आहेत. हे यरुशलेमे,
तूं हाय हाय करणार! तूं आपणाला शुद्ध करणार नाहींस
काय? असें कोठवर चालणार?

१४ १ अवर्षणाविषयीं यिर्मयाला परमेश्वराचें
वचन प्राप्त झालें तें हें:
२ यहूदा शोक करीत आहे, त्याच्या वेशी
उदासवाण्या झाल्या आहेत; ते भूमीवर शोक करीत
पडले आहेत; यरुशलेमाची आरोळी वर गेली आहे.
३ त्यांतले श्रेष्ठ जन आपल्या कनिष्ठांस पाण्यासाठीं
पाठवितात; ते विहिरीवर जातात पण त्यांस पाणी
मिळत नाहीं, ते रिकाम्या घागरी घेऊन येतात; ते
लज्जित व फजीत होऊन आपलीं डोकीं झाकून घेतात.
४ पृथ्वीवर पाऊस न पडल्यानें जमीन व्याकुळ झाली
आहे; म्हणून शेतकरी फजीत होऊन आपलीं डोकीं
झाकून घेत आहेत. ५ रानांतली हरिणीहि व्यालेल्या
पाडसांस टाकून जात आहे, कारण गवत नाहींसें झालें
आहे. ६ रानगाढवें उजाड टेकड्यांवर उभीं राहून
कोल्ह्यांप्रमाणें धापा टाकीत आहेत, झाडपाला कांहींएक
नसल्यामुळें त्यांचे डोळे खोल गेले आहेत.
७ हे परमेश्वरा, आमचे अपराध जरी आम्हांविरुद्ध
साक्ष देतात तरी तूं आपल्या नामास्तव कार्य कर;
आमचें कितीदा पतन झालें आहे! तुजविरुद्ध आम्हीं
पाप केलें आहे. ८ हे इस्राएलाच्या आशाकंदा,
संकटसमयींच्या त्यांच्या त्रात्या, देशांतल्या उपऱ्या-
सारखा, रात्रीच्या उतारूसारखा तूं कां झालास?
९ स्तब्ध झालेल्या मनुष्यासारखा, वीर असून उद्धार
करण्यास असमर्थ अशा पुरुषासारखा कां झालास?
तरी हे परमेश्वरा, तूं आमच्यामध्यें आहेस, तुझें नाम
आम्हांस दिलेलें आहे; आमचा त्याग करूं नको.
१० परमेश्वर या लोकांस असें म्हणतो, त्यांस अशा
प्रकारें भटकणें आवडलें, त्यांनीं आपले पाय आवरिले
नाहींत; म्हणून परमेश्वर त्यांचा स्वीकार करीत नाहीं;
तो आतां त्यांचें दुष्कर्म स्मरून त्यांच्या पापांची झडती
घेईल. ११ परमेश्वर मला म्हणाला, या लोकांसाठीं,
त्यांच्या बऱ्यासाठीं, प्रार्थना करूं नको. १२ ते उपोषण
करितील तेव्हां मी त्यांची आरोळी ऐकणार नाहीं; ते
होमार्पण व अन्नार्पण मला आणितील तीं मी स्वीकार-
णार नाहीं; मी तरवारीनें, दुष्काळानें व मरीनें त्यांचा
संहार करीन. १३ मग मी म्हणालों, हे प्रभू परमेश्वरा,
पाहा, संदेष्टे त्यांस म्हणत आहेत, तुम्ही तरवार पाह-
णार नाहीं, तुम्हांस दुष्काळ गांठणार नाहीं; तर या
स्थळीं मी तुम्हांस खरी शांति देईन. १४ परमेश्वर
मला म्हणाला, संदेष्टे माझ्या नामानें असत्य संदेश
देतात; मीं त्यांस पाठविलें नाहीं, मी त्यांजबरोबर
बोललों नाहीं; ते खोटा दृष्टांत, शकुन, निरर्थक गोष्टी व
आपल्या मनांतील कपटयोजना संदेशरूपानें तुम्हांस
सांगतात. १५ यास्तव ज्या संदेष्ट्यांस मीं पाठविलें
नाहीं व जे माझ्या नामानें संदेश देतात व म्हणतात,
या देशावर तरवार व दुष्काळ येणार नाहीं, त्यांच्या-
संबंधानें परमेश्वर म्हणतो, हे संदेष्टे तरवारीनें व
दुष्काळानें नष्ट होतील; १६ आणि ज्या लोकांस ते संदेश
देतात तेहि दुष्काळानें व तरवारीनें मरतील व त्यांस
यरुशलेमाच्या रस्त्यांनीं फेकून देतील; त्यांस, त्यांच्या
स्त्रियांस, त्यांच्या पुत्रांस व त्यांच्या कन्यांस कोणी पुर-
णार नाहीं; मी त्यांची दुष्टता त्यांजवर लोटीन.
१७ तूं त्यांस हें वचन सांग, माझ्या डोळ्यांतून रात्रं-

दिवस अश्रुधारा वाहोत, त्या न थांबोत; कारण माझ्या
लोकांची कुवार कन्या भयंकर जखम लागून अति छिन्न-
भिन्न झाली आहे. १८ मी वनांत जातों तों तेथें
तरवारीनें वधलेले आहेत ! शहरांत येतों तों
दुष्काळानें पीडलेले मला आढळतात; कारण संदेष्टे
व याजक हे अज्ञात देशांत भटकत आहेत.

१९ तूं यहूदाचा अगदीं त्याग केला आहे काय?
तुझ्या जिवाला सीयोनाचा वीट आला आहे काय?
आम्हीं बरें होऊं नये असें तूं आम्हांस कां मारिलें
आहे? आम्ही शांतीची अपेक्षा करितों पण हित कांहीं
होत नाहीं; आम्ही बरे होण्याची वाट पाहतों तों पाहा
दहशत. २० हे परमेश्वरा, आमची दुष्टता, आमच्या
पूर्वजांचें दुष्कर्म, आम्ही जाणतों; आम्हीं तुजविरुद्ध पाप
केलें आहे. २१ तूं आपल्या नामास्तव आमचा वीट
मानूं नको; तुझ्या वैभवाच्या गादीची अप्रतिष्ठा करूं
नको; आम्हांशीं केलेला करार स्मर, तो मोडूं नको.
२२ विदेश्यांच्या निरुपयोगी दैवतांत कोणी पर्जन्य
देणारीं आहेत काय? आकाशाला वृष्टि करितां येईल
काय? हे परमेश्वरा, आमच्या देवा, हें करणारा तूंच
ना? आम्ही तुझी आशा धरितों, कारण तूं ह्या सर्वांस
उत्पन्न केलें आहे.

१५ १ मग परमेश्वर मला म्हणाला, मोशे व
शमुवेल हे मजपुढें उभे राहिले तरी माझें
अंतःकरण या लोकांकडे वळावयाचें नाहीं;
त्यांस माझ्या दृष्टीसमोरून घालीव, त्यांस निघून जाऊं
दे. २ ते जर तुला म्हणतील, आम्हीं कोठें जावें? तर
त्यांस सांग, परमेश्वर असें म्हणतो, जे मृत्यूसाठीं नेमि-
लेले आहेत त्यांनीं मृत्यूकडे; जे तरवारीसाठीं नेमिलेले
आहेत त्यांनीं तरवारीकडे; जे दुष्काळासाठीं नेमिलेले
आहेत त्यांनीं दुष्काळाकडे; व जे बंदिवासासाठीं नेमिलेले
आहेत त्यांनीं बंदिवासांत जावें. ३ परमेश्वर म्हणतो,
मी त्यांजवर चार गोष्टी आणीन: ठार करण्यास
तरवार, फाडून टाकण्यास कुत्रे, खाऊन नाश करण्यास
आकाशांतील पक्षी आणि पृथ्वीवरील श्वापदें.
४ यहूदाचा राजा हिज्कीया याचा पुत्र मनश्शे यानें
यरुशलेमांत जें कांहीं केलें यामुळें पृथ्वीवरल्या सर्व
राष्ट्रांना, दहशत पोहंचेल असें मी त्यांचें करीन. ५ हे
यरुशलेमा, कोणाला तुझी करुणा येईल? कोण तुज-
साठीं शोक करील? कोण तुजकडे वळून तुझें क्षेम-
कुशल विचारील? ६ परमेश्वर म्हणतो, तूं माझा त्याग
केला आहे; तूं मागें फिरला आहेस; म्हणून मी आपला
हात तुजवर उगारून तुझा नाश करीन; मी अनुताप
करून करून कंटाळलों आहें. ७ मीं त्यांस आपल्या
देशाच्या वेशींवर सुपानें पाखडून टाकिलें, त्यांस अपत्य-
हीन केलें; मीं त्या लोकांचा विध्वंस केला, कारण ते
आपल्या मार्गांवरून मागें फिरले नाहींत. ८ मजसमोर
त्यांच्या विधवा सागराच्या वाळूपेक्षां अधिक झाल्या
आहेत; मी भरदुपारीं त्यांजवर व तरुणांच्या मातेवर
लुटारू आणितों; तिजवर क्लेश व त्रेधा हीं अकस्मात्
ओढवतील असें मी करितों. ९ सातपुती म्लान झाली
आहे; ती प्राण सोडीत आहे; भरदिवसां तिचा सूर्य
मावळत आहे; ती लज्जित व फजीत होत आहे; त्यांचा
अवशेष त्यांच्या वैऱ्यांसमक्ष मी तरवारीस बळी देईन,
असें परमेश्वर म्हणतो.

१० अगे माझ्या आई! हाय हाय! सर्व जगाबरोबर
झगडा व विवाद करणाऱ्या अशा मला तूं जन्म दिला
आहे. मीं कोणाशीं वाढीदिढीचा व्यवहार केला
नाहीं व कोणीं मजशीं केला नाहीं; तरी सर्व मला
शाप देतात. ११ परमेश्वर म्हणतो, तुझ्या बऱ्या-
साठीं मी तुला खचीत बळ देईन; अनिष्टाच्या व
क्लेशाच्या समयीं शत्रु तुझी विनवणी करतील असें
मी खचीत करीन.

१२ कोणी लोखंड, उत्तरेहून आणिलेलें लोखंड व
पितळ, फोडूं शकतो काय? १३ तुझ्या सर्व पातकां-
मुळें तुझ्या सर्व हद्दींतील तुझें वित्त व निधि मी
मोबदल्यावांचून लूट म्हणून देईन. १४ तुला ठाऊक
नाहीं अशा देशांत तुझे शत्रु ती लूट घेऊन जातील
असें मी करीन; कारण माझा क्रोधाग्नि पेटला आहे,
तुम्हांविरुद्ध पेटला आहे.

१५ हे परमेश्वरा, तूं जाणत आहेस; माझें स्मरण

करून मला भेट दे, माझ्याकरितां मला छळणाऱ्यांचा
सूड घे ! तूं त्यांच्यासंबंधानें मंदक्रोध होऊन माझा
संहार करूं नको; तुझ्यासाठीं मी निंदा सहन करितों
याचें स्मरण कर. १६ मला तुझीं वचनें प्राप्त झालीं
तीं मीं स्वीकारिलीं[1]; तुझीं वचनें माझा आनंद, माझ्या
जिवाचा उल्लास अशीं होतीं; कारण हे परमेश्वरा,
सेनाधीश देवा, तुझें नाम घेऊन मी आपणास तुझा
म्हणवितों. १७ विनोद करणाऱ्या मंडळींत मी बसलों
नाहीं, मीं मजा केली नाहीं; तुझा हात मजवर पडल्या-
मुळें, मी एकांतीं बसलों; कारण तूं मला अस्वस्थ
केलें आहे. १८ मला सतत दुःख कां ? माझी जखम
भारी व असाध्य कां ? फसविणारा ओहोळ, आटून
जाणारें पाणी, यांसारखा तूं खरोखर मला होशील काय ?
१९ ह्याकरितां परमेश्वर असें म्हणतो, तूं वळशील तर
माझ्या सेवेस हजर राहण्यास मी तुला परत आणीन; तूं
हीणकसापासून मौल्यवान् वेगळें करिशील तर तूं माझें
मुख होशील; ते तुजकडे परत येतील, पण तूं त्यांजकडे
जाणार नाहींस. २० तुला, या लोकांसंबंधानें मी पितळेची
मजबूत भिंत करीन; म्हणजे ते तुजबरोबर लढाई
करितील, तरी तुजवर वरचढ होणार नाहींत; कारण तुझा
बचाव करण्यास व तुला सोडविण्यास मी तुझ्याबरोबर
आहें, असें परमेश्वर म्हणतो. २१ मी तुला दुष्टांच्या हातून
सोडवीन, तुला बलात्काऱ्यांच्या तावडींतून मुक्त करीन.

१६
१ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें तें
असें: २ तूं बायको करूं नको व या स्थलीं
तुला पुत्र व कन्या न होवोत. ३ कारण या
देशांत जन्मलेले पुत्र व कन्या यांविषयीं व ज्या माता
त्यांस प्रसवल्या व ज्या पित्यांनीं त्यांस जन्म दिला त्यांज-
विषयीं परमेश्वर असें म्हणतो कीं, ४ तीव्र यातना होऊन
तीं मरतील; त्यांच्याकरितां कोणी शोक करणार नाहीं
व त्यांस कोणी पुरणार नाहीं; तीं भूमीला खत होतील;
त्यांचा तरवारीनें व दुष्काळानें संहार होईल; त्यांचीं
प्रेतें आकाशांतील पक्ष्यांस व पृथ्वीवरील श्वापदांस भक्ष्य
होतील. ५ कारण परमेश्वर म्हणतो कीं शोक करितात
त्या घरांत प्रवेश करूं नको, विलाप करण्यास जाऊं
नको, त्यांच्याविषयीं खेद करूं नको; कारण या लोकां-
पासून मीं आपली शांति काढून घेतली आहे, कृपा व
दया हीं काढिलीं आहेत असें परमेश्वर म्हणतो. ६ या
देशांतील लहानथोर मरतील; कोणी त्यांस पुरावयाचे
नाहींत, कोणी त्यांकरितां शोक करावयाचे नाहींत, कोणी
त्यांजमुळें आपल्या शरीरांस घाय करणार नाहींत,
त्यांजमुळें आपलीं डोकीं भादरणार नाहींत. ७ मृतां-
विषयीं एकाद्याचें समाधान करावें म्हणून कोणी त्यांज-
साठीं भाकरी मोडणार नाहींत; कोणाचे आईबाप मेले
तर त्यांचें सांत्वन करण्यास कोणी त्यांच्यापुढें प्याला
करणार नाहींत. ८ ज्या घरांत मेजवानी असेल त्यांत
जाऊं नको, त्यांच्याबरोबर खाण्यापिण्यास बसूं नको.
९ कारण सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो,
पाहा, तुमच्या हयातींत, तुमच्या डोळ्यांपुढें या
ठिकाणांतून खुशालीचा व आनंदाचा शब्द, नवऱ्याचा
व नवरीचा शब्द नाहींसा होईल असें मी करीन.
१० तूं ह्या लोकांस ह्या सर्व गोष्टी सांगितल्या
म्हणजे ते तुला विचारितील, परमेश्वरानें हें सर्व
मोठें अरिष्ट आम्हांवर येईल असें कां सांगितलें ? पर-
मेश्वर आमचा देव याच्याविरुद्ध आम्हीं कोणता
अपराध, कोणतें पातक केलें आहे ? ११ तेव्हां तूं
त्यांस सांग, परमेश्वर म्हणतो, कारण हेंच कीं तुमच्या
पूर्वजांनीं माझा त्याग केला, ते अन्य देवांमागें लागले,
त्यांनीं त्यांची सेवा व भजन केलें, त्यांनीं मला सोडिलें,
माझें नियमशास्त्र पाळिलें नाहीं. १२ तुम्ही तर
तुमच्या पूर्वजांच्यापेक्षां जास्त दुष्कर्म केलें आहे; कारण
पाहा, तुम्ही सगळे आपल्या दुष्ट मनाच्या हट्टाप्रमाणें
वागत असून माझें ऐकत नाहीं; १३ ह्याकरितां जो
तुम्हांस ठाऊक नाहीं व तुमच्या पूर्वजांसहि ठाऊक
नाहीं अशा देशांत तुम्हांस ह्या देशांतून घालवून
देईन; तेथें तुम्ही रात्रंदिवस अन्य देवांची सेवा करीत
राहाल; कारण मी तुम्हांवर कृपा करणार नाहीं.
१४ परमेश्वर म्हणतो, पाहा, यास्तव असे दिवस

[1] मुळांत : सेवन केलीं;

येत आहेत कीं ज्या परमेश्वरानें इस्राएलवंशजांस मिसर
देशांतून आणिलें त्याच्या जीविताची शपथ असें
कोणी म्हणणार नाहीं; १५ तर ज्या परमेश्वरानें इस्राएल-
वंशजांस उत्तर देशांतून, व ज्या देशांत त्यांस त्यानें हाकून
लाविलें होतें त्या देशांतून आणिलें, त्या परमेश्वराच्या
जीविताची शपथ असें म्हणतील; कारण जी भूमि मीं
त्यांच्या पूर्वजांस दिली तींत त्यांस मी परत आणीन.
१६ परमेश्वर म्हणतो, पाहा, मी पुष्कळ पाग टाकणा-
ऱ्यांस बोलावीन, म्हणजे ते त्यांस पाग टाकून पकडितील;
नंतर मी पुष्कळ शिकाऱ्यांस बोलावीन, म्हणजे ते
प्रत्येक डोंगरावरून, प्रत्येक टेकडीवरून व खडकांच्या
कपारींतून त्यांस हुसकून काढून त्यांची शिकार करितील.
१७ कारण माझे डोळे त्यांच्या सर्व मार्गांवर आहेत;
ते मला गुप्त नाहींत; त्यांचें दुष्कर्म माझ्या डोळ्यांपासून
लपलेलें नाहीं; १८ प्रथमतः त्यांचें दुष्कर्म व त्यांचें
पाप यांचें दुप्पट प्रतिफळ मी त्यांस देईन; कारण,
त्यांनीं आपल्या प्रेतवत् व अमंगळ मूर्तींनीं माझा देश
भ्रष्ट केला आहे; त्यांनीं आपल्या किळसवाण्या वस्तूंनीं
माझें वतन भरिलें आहे. १९ हे परमेश्वरा, माझ्या
सामर्थ्या, माझ्या दुर्गा, संकटसमयींच्या माझ्या आश्रया,
पृथ्वीच्या दिगंतांपासून राष्ट्रें तुजकडे येऊन म्हणतील,
आमच्या पूर्वजांस खोट्या, निरर्थक व निरुपयोगी अशा
वस्तूंचाच काय तो वतनभाग मिळाला. २० मानव
आपणासाठीं देव बनवील काय? असल्या वस्तु तर
देव नव्हत; २१ म्हणून पाहा, मी त्यांस दाखवून देईन,
माझें भुजबल व पराक्रम हीं त्यांस एकदाचीं दाखवीन,
म्हणजे माझें नाम परमेश्वर आहे असें ते जाणतील.

१७
१ यहूदाचें पातक लोखंडी लेखणीनें,
हिरकणीच्या टोकानें लिहिलें आहे; त्यांच्या
हृदयपटावर, त्यांच्या वेद्यांच्या शृंगांवर खोदिलें
आहे; २ कारण त्यांची संतति उंच टेकड्यांवरील
हिरव्या झाडांजवळच्या वेद्या व अशेरामूर्ति यांचें स्मरण
ठेविते. ३ हे माझ्या रानांतल्या पर्वता, तुझें वित्त,
तुझे सर्व निधि व तुझ्या सर्व सीमांच्या आंतील तुझीं
उच्चस्थानें तुझ्या पापामुळें मी लुटीस जाऊं देईन. ४ मीं
जें तुला वतन दिलें तें तुझ्या हातचें जाईल; तुला
ठाऊक नाहीं अशा देशांत तूं आपल्या शत्रूंची सेवा
करिशील असें मी करीन; कारण माझ्या क्रोधाग्नि तुम्हीं
भडकविला आहे, तो सर्वकाळ जळत राहील

५ परमेश्वर असें म्हणतो, जो इसम मनुष्यावर
भिस्त ठेवितो, मानवाला आपला बाहु करितो व ज्याचें
अंतःकरण परमेश्वरापासून फिरलें आहे तो शापित
आहे. ६ तो वैराणांतल्या झुडपासारखा होईल; व
जें कल्याण होईल तें तो पाहणार नाहीं; अरण्यांतील रूक्ष
स्थळें, क्षारभूमि व निर्जन प्रदेश यांत तो वस्ती करील.
७ जो पुरुष परमेश्वरावर भाव ठेवितो, ज्याचा भाव-
विषय परमेश्वर आहे तो धन्य. ८ तो जलतटाकीं
लाविलेल्या वृक्षासारखा होईल, तो आपलीं मुळें नदी-
तटाकीं पसरील; उन्हाची झळई येते तिला तो भिणार
नाहीं, त्याचीं पानें हिरवीं राहतील; अवर्षणाच्या वर्षी
त्याला चिंता पडणार नाहीं, तो फळें देण्याचें सोडणार
नाहीं. ९ हृदय सर्वांत कपटी आहे, तें असाध्य रोगानें
ग्रस्त आहे, त्याचा भेद कोणास समजतो? १० प्रत्येकास
त्याच्या त्याच्या वर्तनाप्रमाणें, त्याच्या त्याच्या करणी-
प्रमाणें प्रतिफळ देण्यास मी परमेश्वर हृदय चाळून
पाहतों; अंतर्याम पारखितों. ११ तित्तिर पक्षी आपण
न घातलेलीं अंडीं उबवितो तसें अन्यायानें धन मिळ-
विणाऱ्याचें आहे; तें त्याला त्याच्या आयुष्याच्या ऐन
भरांत सोडून जाईल; व तो अंतीं मूर्ख ठरेल.

१२ आमच्या पवित्र स्थानाचें स्थल, सनातन काळा-
पासून उच्च व वैभवी सिंहासन आहे. १३ हे परमेश्वरा,
इस्राएलाच्या आशाकंदा, तुझा त्याग करणारे सर्व
फजीत होतील; मजपासून फिरणाऱ्यांचीं नांवें धुळीवर
लिहिलीं जातील, कारण परमेश्वर जो जीवंत पाण्याचा
झरा त्याचा त्यांनीं त्याग केला आहे. १४ हे परमेश्वरा,
मला बरें कर म्हणजे मी बरा होईन; मला तार म्हणजे
मी तरेन; कारण तूं माझा स्तवनविषय आहेस.
१५ पाहा, ते मला म्हणतात, परमेश्वराचें वचन कोठें
आहे? तें पुरें होऊं द्या. १६ मीं तुला अनुसरणारा
तुझा मेंढपाळ असण्यापासून माघार घेतली नाहीं आणि

संकटाच्या दिवसाची अपेक्षा केली नाहीं, हें तुला ठाऊक आहे; जें माझ्या तोंडून निघालें तें तुझ्या दृष्टीसमोर होतें. १७ तूं मला भीतिप्रद होऊं नको, विपत्काळीं तूं माझा आश्रय आहेस. १८ माझा छळ करणारे फजीत होवोत; मीं फजीत न व्हावें. ते घाबरे होवोत; मीं घाबरा न व्हावें. त्यांजवर विपत्काळ आण, दुप्पट नाशानें त्यांचा नायनाट कर.

१९ परमेश्वर मला म्हणाला, ज्या वेशीनें यहूदाचे राजे येतातजातात त्या सार्वजनिक वेशींत व यरुशलेमाच्या सर्व वेशींत जाऊन उभा राहा; २० आणि लोकांस सांग, अहो यहूदाच्या राजांनो, हे सर्व यहूदा, या वेशींनी वागणारे सर्व यरुशलेमनिवासी जनहो, परमेश्वराचें वचन ऐका. २१ परमेश्वर म्हणतो, तुम्ही आपणाविषयीं सावध असा, शब्बाथ दिवशीं कांहीं ओझें वाहूं नका, यरुशलेमाच्या वेशींतून तें आणूं नका. २२ शब्बाथ दिवशीं आपल्या घरांतून कांहीं ओझें बाहेर नेऊं नका; कांहीं कामधंदा करूं नका, आणि तुमच्या पूर्वजांस मीं आज्ञापिल्याप्रमाणें शब्बाथ दिवस पवित्रपणें पाळा; २३ पण त्यांनीं ऐकलें नाहीं; त्यांनीं आपला कान दिला नाहीं; ऐकूं नये व शिक्षण घेऊं नये म्हणून त्यांनीं आपली मान ताठ केली. २४ तथापि परमेश्वर म्हणतो, शब्बाथ दिवशीं या नगराच्या वेशींतून तुम्ही कांहीं ओझें आणणारनेणार नाहीं आणि शब्बाथ दिवशीं कांहीं कामधंदा न करितां तो पवित्रपणें पाळाल, म्हणून हें तुम्ही मनापासून ऐकाल; २५ तर असें होईल कीं दाविदाच्या सिंहासनावर बसणारे राजे व सरदार रथारूढ व अश्वारूढ होऊन आणि त्यांचे सरदार, यहूदाचे लोक व यरुशलेमनिवासी या नगराच्या वेशींतून येजा करितील व हें नगर सर्वकाळ वसेल. २६ यहूदाच्या नगरांतून, यरुशलेमाच्या लगस्पांतून, बन्यामीन प्रांतांतून, तळवटींतून, डोंगरवटींतून व दक्षिणेंतून ते येऊन होमबलि, यज्ञबलि, अन्नार्पण व धूप अर्पितील. असे ते परमेश्वराच्या मंदिरांत स्तुतिपर्पणें आणितील; २७ पण तुम्ही शब्बाथ पवित्रपणें पाळावा, शब्बाथ दिवशीं ओझें वाहूं नये व यरुशलेमाच्या वेशींतून येजा करूं नये, ही माझी आज्ञा तुम्ही ऐकणार नाहीं तर त्याच्या वेशींत मी अग्नि पेटवीन; तो यरुशलेमाचे वाडे जाळून खाक करील, तो विझणार नाहीं.

**१८** १ परमेश्वरापासून जें वचन यिर्मयाला प्राप्त झालें तें हें: २ ऊठ, कुंभाराच्या घरीं जा, तेथें मी तुला आपलीं वचनें ऐकवीन. ३ मी कुंभाराच्या घरीं गेलों तों तो चाकावर काम करीत होता. ४ कुंभार मातीचें पात्र घडीत होता; तें त्याच्या हातीं असतांच बिघडून गेलें, मग त्याला पाहिजे तसें त्यानें तिचें दुसरें पात्र घडिलें.

५ तेव्हां परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें: ६ हे इस्राएलाच्या घराण्या, या कुंभाराप्रमाणें मला तुमचें पाहिजे तें करतां येत नाहीं काय, असें परमेश्वर म्हणतो. हे इस्राएलाच्या घराण्या, पाहा, कुंभाराच्या हातीं माती असते तसे तुम्ही माझ्या हातीं आहां. ७ एकादें राष्ट्र अथवा राज्य समूळ उपटून नष्ट करीन असें मी एकदा बोललों; ८ तरी पण ज्या राष्ट्राविरुद्ध हें मी बोललों, तें आपली दुष्टता सोडील तर त्यावर जें अरिष्ट आणण्याचा माझा विचार होता त्याविषयीं मला अनुताप होईल. ९ एकाद्या राष्ट्राची अथवा राज्याची लागवण करून तें मी स्थापीन असें मी एकदा बोललों, १० तरी पण माझ्या दृष्टीनें जें वाईट तें करून त्यानें माझें वचन पाळिलें नाहीं; म्हणून त्याचें मी हित करीन म्हणून बोललों त्याविषयीं मला अनुताप होईल. ११ तर आतां यहूदाचे लोक व यरुशलेमनिवासी यांस जाऊन सांग: परमेश्वर म्हणतो, पाहा, मी तुम्हांवर अनर्थ योजीत आहें, तुम्हांविरुद्ध मनसुबा योजीत आहें; तुम्ही समळे आपआपल्या कुमार्गापासून वळा, आपल्या चालीरिती सुधारा. १२ तरी ते म्हणतात, काय उपयोग? आम्ही आपल्या मनसुब्यांप्रमाणें चालणार; आम्ही सर्व आपआपल्या दुष्ट मनाच्या हट्टाप्रमाणें करणार.

१३ यास्तव परमेश्वर म्हणतो, राष्ट्रांमध्यें चौकशी करून पाहा, अशा गोष्टी कोणी कधीं ऐकल्या आहेत काय? इस्राएलाच्या कुमारीनें अति घोर कर्म केलें आहे. १४ लबानोन पर्वताच्या शिखरावरील बर्फ

कधीं नाहींसें होतें काय? दुरून खालीं वाहत येणारें
थंड पाणी आटतें काय? १५ तरी पण माझे लोक
मला विसरले आहेत, ते व्यर्थतेपुढें धूप जाळितात;
त्यांनीं त्यांच्या मार्गांत, त्यांच्या प्राचीन मार्गांत त्यांस
ठोकर खावयास लाविलें; भर घालून तयार न
केलेल्या आडवाटांनीं त्यांस जाण्यास लाविलें.
१६ अशा प्रकारें ते आपला देश दहशत व निरंतरचा
उपहास यांस पात्र करितात; त्याजवरून येणारा-
जाणारा प्रत्येक जण विस्मित होऊन आपलें डोकें
हालवील. १७ पूर्वेकडील वाऱ्याप्रमाणें मी त्यांस शत्रूंपुढें
विखरीन; त्यांच्या संकटसमयीं मी त्यांजकडे पाठ
करीन, तोंड करणार नाहीं.

१८ तेव्हां ते म्हणाले, चला, आपण यिर्मयाविरुद्ध
मनसुबा करूं, कारण याजकाचें नियमशास्त्रज्ञान,
मंत्र्याची मसलत, संदेष्ट्याचें वचन हीं त्यांस सोडणार
नाहींत. चला, आपण त्याच्यावर आरोप ठेवूं, त्याच्या
कोणत्याहि भाषणाची पर्वा करणार नाहीं.

१९ हे परमेश्वरा, मजकडे लक्ष दे, मजबरोबर
झगडणाऱ्यांची वाणी ऐक. २० बऱ्याची फेड वाइटानें
व्हावी काय? कारण त्यांनीं माझ्या जिवासाठीं खाडा
खणिला आहे. तुझा त्यांजवरल्या संतापाचें निवारण
व्हावें म्हणून त्यांच्यासाठीं मध्यस्थी करण्यास मी
तुजसमोर उभा राहिलों याचें स्मरण कर. २१ यामुळें
त्यांचे पुत्र दुष्काळांत सांपडूं दे, त्यांस तरवारीच्या
तडाक्यांत सांपडूं दे; त्यांच्या स्त्रिया अपत्यहीन व
विधवा होवोत, मृत्यु त्यांचे पुरुष ठार करो; त्यांचे
तरुण लढाईत तरवारीनें पडोत. २२ तूं त्यांच्यावर
एकाएकीं सैन्य आणिशील तेव्हां त्यांच्या घरांतून
आक्रोश कानीं पडो; कारण त्यांनीं मला पकडण्यासाठीं
खाडा खणिला आहे, माझ्या पायांसाठीं पाश मांडिले
आहेत. २३ हे परमेश्वरा, मला मारण्याचे त्यांचे
सर्व मनसुबे तूं जाणतोसच; त्यांच्या दुष्कर्मांची
क्षमा करूं नको, आपल्या दृष्टीपुढून त्यांचें पातक पुसून
टाकूं नको; म्हणजे ते तुजपुढें ठोकर खाऊन पडतील;
तुझ्या कोपसमयीं त्यांची अशी वाट लाव.

१९ १ परमेश्वर म्हणाला, जा, कुंभाराचें एक
मडकें विकत घे आणि आपल्याबरोबर लोकांचे
व याजकांचे कांहीं वडील घेऊन, २ जेथें
खापऱ्या टाकितात त्या वेशीसमोरच्या बेन-हिन्नोम
खोऱ्यांत जा; तेथें मी तुला सांगेन तीं वचनें जाहीर
कर. ३ असें म्हण, अहो यहूदाच्या राजांनो, व अहो
यरुशलेमनिवासी जनांनो, परमेश्वराचें वचन ऐका; सेना-
धीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, पाहा, या स्थला-
वर मी अरिष्ट आणितों, त्याविषयीं जो कोणी ऐकेल
त्याचे कान भणभणतील. ४ त्यांनीं माझा त्याग केला
आहे, हें स्थान त्यांनीं परक्यांचें असें मानिलें आहे;
त्यांचे पूर्वज व यहूदाचे राजे यांस जे माहीत नव्हते
अशा अन्य देवांपुढें त्यांनीं तेथें धूप जाळिला;
निर्दोष्यांच्या रक्तानें तें स्थान भरिलें; ५ आणि बाल-
दैवताप्रीत्यर्थ आपले पुत्र होमार्पण म्हणून अग्नींत
होम करण्यासाठीं त्यांनीं उच्चस्थानें बांधिलीं; अशी
आज्ञा मीं केली नव्हती, हें मीं सांगितलें नव्हतें, हें
माझ्या मनांतहि आलें नव्हतें. ६ परमेश्वर म्हणतो,
पाहा, या कारणास्तव या स्थलास तोफेत व बेन-
हिन्नोमाचें खोरें म्हणणार नाहींत, तर वधाचें खोरें
म्हणतील; असे दिवस येत आहेत. ७ या स्थळीं
यहूदा व यरुशलेम यांची मसलत मी निष्फळ करीन;
त्यांच्या शत्रूंपुढें त्यांचा जीव घेण्यास टपणाऱ्यांच्या
हातानें, तरवारीनें ते पडतील असें मी करीन; त्यांचीं
प्रेतें आकाशांतील पक्ष्यांस व पृथ्वीवरील श्वापदांस भक्ष्य
म्हणून देईन. ८ मी हें नगर विस्मय व उपहास यांस
पात्र करीन; त्यावर झालेल्या सर्व आघातांमुळें त्याजवरून
जाणारायेणारा प्रत्येक जण विस्मित होऊन उपहास
करील. ९ मी त्यांस त्यांच्या पुत्रांचें मांस व त्यांच्या
कन्यांचें मांस खावयास लावीन; त्यांचे शत्रु व त्यांचा
जीव घेण्यास टपणारे त्यांस वेढा घालितील व पेचांत
आणितील, तेव्हां त्यांतला प्रत्येक जण आपल्या
शेजाऱ्याचें मांस खाईल. १० मग जीं मनुष्यें तुजबरोबर
जातील त्यांच्या डोळ्यांदेखत तें मातीचें मडकें फोड;

११ आणि त्यांस सांग, सेनाधीश परमेश्वर म्हणतो,
कुंभाराच्या मडक्याचा भंग केल्यास तें नीट करितां
येत नाहीं, तसें मी या लोकांचा व या नगराचा भंग
करीन आणि पुरावयास जागा उरणार नाहीं इतके
लोक तोफेत येथें पुरण्यांत येतील. १२ परमेश्वर
म्हणतो, हें नगर तोफेतासारखें करावें म्हणून मी हें
स्थल व यांतील रहिवासी यांचें असें करीन; १३ ज्या
सर्व घरांच्या धाब्यावर त्यांनीं आकाशांतील सर्व
सेनांस धूप जाळिला व अन्य देवांस पेयार्पणें अर्पिलीं
तीं यरुशलेमांतील घरें व यहूदाच्या राजांचीं घरें
तोफेताच्या स्थलाप्रमाणें अशुद्ध होतील.

१४ मग परमेश्वरानें यिर्मयास तोफेत एथें जाऊन
संदेश देण्यास पाठविलें; तेथून तो आला व परमे-
श्वराच्या मंदिराच्या अंगणांत उभा राहून सर्व लोकांस
म्हणाला, १५ सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव
म्हणतो, पाहा, मी ह्या नगरावर व त्याच्या सर्व
गांवांवर जें अरिष्ट आणणार म्हणून म्हणालों तें सर्व
आणीन, कारण माझीं वचनें ऐकूं नयेत म्हणून त्यांनीं
आपली मान ताठ केली.

२० १ परमेश्वराच्या मंदिरांतला प्रमुख अधिपति
इम्मेराचा पुत्र पशहूर याजक यानें यिर्मया
जो हा संदेश सांगत होता तो ऐकला. २ तेव्हां
पशहूरानें यिर्मया संदेष्ट्याला फटके मारिले आणि परमे-
श्वराच्या मंदिरांतील वरल्या बाजूच्या बन्यामीनद्वारांत
खोडे होते त्यांत त्यास अडकवून ठेविलें. ३ सकाळीं
पशहूरानें यिर्मयास खोड्यांतून काढून बाहेर आणिलें,
तेव्हां यिर्मया त्यास म्हणाला, परमेश्वरानें तुझें नांव
पशहूर नव्हे तर मागोर-मिस्साबीब ( चोहोंकडे दह-
शत ) ठेविलें आहे. ४ परमेश्वर म्हणतो, पाहा, तूं
स्वतांस व तुझ्या सर्व इष्टमित्रांस दहशत होशील,
असें मी करीन; ते आपल्या शत्रूंच्या तरवारीनें
पडतील, हें तुझे डोळे पाहतील; बाबेलच्या राजाच्या
हातीं मी सर्व यहूदा देईन; तो त्यांस बंदिवान करून
बाबेलास नेईल व तरवारीनें वधील. ५ नगरांतले सर्व
निधि, त्यांतली सर्व कमाई, त्यांतल्या सर्व मोल्यवान्
वस्तु व यहूदाच्या राजांचीं सर्व भांडारें मी त्यांच्या
शत्रूंच्या हातीं देईन, आणि ते तीं लुटून बाबेलास
घेऊन जातील. ६ हे पशहूरा, तूं व तुझ्या घरांत
राहणारे ह्या सर्वांना धरून नेण्यांत येईल; तूं बाबेलास
जाऊन तेथें मरशील, तुला व ज्यांस तूं खोटा संदेश
दिला त्या तुझ्या सगळ्या इष्टमित्रांला तेथेंच पुरितील.

७ हे परमेश्वरा, तूं मला फसविलें आणि मी फसलों;
तूं मजहून प्रबळ असल्यामुळें विजयी झालास; मी
दिवसभर हसण्याचा विषय झालों आहें; जो तो माझा
उपहास करितो. ८ कारण मी बोलूं लागलों कीं जुलम,
लूट, हे शब्द मला उच्चारावे लागतात आणि दिवसभर
परमेश्वराचें वचन माझ्या निंदेला व अप्रतिष्ठेला कारण
झालें आहे. ९ मी म्हणालों, मी त्याचें नांव काढणार
नाहीं, यापुढें मी त्याच्या नामानें बोलणार नाहीं, तेव्हां
माझ्या हाडांत कोंडलेला अग्नि जळत आहे असें माझ्या
हृदयाला झालें; मी स्वतांला आवरितां आवरितां थकलों,
पण मला तें साधेना. १० कारण मी पुष्कळांना
कुजबुजतांना ऐकतों; चोहोंकडे दहशत आहे. मला ठेंच
लागावी म्हणून टपणारे माझे सर्व इष्टमित्र म्हणतात कीं
त्याच्याविरुद्ध गिला करा, आपण त्याच्याविरुद्ध गिला करूं;
कदाचित् तो फसेल, म्हणजे मग त्याजहून आपण प्रबळ
होऊन त्याचा सूड उगवूं. ११ तरी परमेश्वर पराक्रमी
वीराप्रमाणें मजबरोबर आहे, म्हणून माझा छळ
करणारे ठोकर खातील, ते प्रबळ होणार नाहींत; ते
शहाणपणानें वागले नाहींत म्हणून ते अत्यंत फजीत
होतील; विसर न पडेल अशी त्यांची कायमची अप्रतिष्ठा
होईल. १२ तरी हे धार्मिकांचें सत्व पाहणाऱ्या, अंत-
र्याम व हृदय पारखणाऱ्या, सेनाधीश परमेश्वरा, तूं
त्यांचा सूड घेशील तो मला पाहूं दे; कारण मीं आपली
फिर्याद तुजपुढें सादर केली आहे. १३ परमेश्वरापुढें
गाणें गा, परमेश्वराचें स्तवन करा; कारण तो
दुष्कर्म्यांच्या हातून दीनाचा जीव वांचवितो.

१४ मी जन्मलों तो दिवस शापित असो; माझी
आई मला प्रसवली तो दिवस धन्य न होवो !
१५ तुला पुत्र झाला हें वर्तमान माझ्या बापास कळवून

त्यास फार हर्षित करणारा मनुष्य शापित असो.
१६ ज्या नगरांचा विध्वंस करून परमेश्वर अनुताप
पावला नाहीं त्यांसारखा तो मनुष्य होवो; सकाळीं
आरोळी, दुपारीं रणशब्द त्याच्या कानीं पडो.
१७ त्यानें मला गर्भाशयांतच मारून टाकिलें नाहीं;
टाकता तर माझी आई माझी कबर झाली असती,
तिचें गर्भस्थान सदा सगर्भ राहिलें असतें. १८ मीं कष्ट
व क्लेश भोगावे व माझे दिवस अप्रतिष्ठेंत घालवावे
याकरितांच मी गर्भाशयांतून बाहेर निघालों काय ?

## २१

१–२ सिदकीया राजानें मल्कीयाचा पुत्र
पशहूर व मासेचा पुत्र सफन्या याजक यांस
यिर्मयाकडे पाठवून सांगितलें, परमेश्वराला प्रश्न
कर; बाबेलचा राजा नबुखद्रेस्सर आमच्याबरोबर लढाई
करीत आहे, तो आम्हांपासून निघून जावा म्हणून
परमेश्वर कदाचित् आपल्या सर्व अद्भुत कृतींस
अनुसरून आम्हांशीं वर्तेल काय, असें विचार; त्या
वेळीं परमेश्वराचें वचन यिर्मयाला प्राप्त झालें तें हें :
३ यिर्मया त्यांस म्हणाला, सिद्कीयास तुम्ही असें
सांगा: ४ इस्राएलाचा देव परमेश्वर म्हणतो, पाहा,
तटाबाहेर तुम्हांस वेढा घालणारा बाबेलचा राजा व
खास्दी लोक यांच्याशीं ज्या शस्त्रांनीं तुम्ही लढत आहां
तीं मी उलटवीन आणि त्यांस या नगरामध्यें एकवट
करीन. ५ राग, संताप व क्रोध यांनीं भरून, बाहु उभा-
रून, बलवान् महाभुजानें तुमच्याबरोबर मी स्वत:
लढेन. ६ या नगरांत राहणारीं मनुष्यें व पशु यांस मी
मारीन; तीं मोठ्या मरीनें मरतील. ७ परमेश्वर म्हणतो,
मग यहूदाचा राजा सिद्कीया, त्याचे चाकर, व
त्याच्या प्रजेंतले जे कोणी मरी, तरवार व दुष्काळ
यांतून वांचून या नगरांत राहतील त्यांस मी बाबेलचा
राजा नबुखद्रेस्सर यांच्या हातीं, त्यांच्या शत्रूंच्या हातीं,
व जे त्यांचा जीव घेण्यास टपत आहेत त्यांच्या हातीं
देईन; तो त्यांस तरवारीनें मारून टाकील; तो त्यांस
सोडावयाचा नाहीं, त्यांजवर दयामाया करावयाचा
नाहीं. ८ या लोकांस असें सांग, परमेश्वर म्हणतो,
पाहा, मी तुम्हांला जीवनाचा मार्ग व मरणाचा मार्ग
दाखवितों. ९ या नगरांत जो राहील तो तरवारीनें,
दुष्काळानें, मरीनें मरेल; जो बाहेर जाऊन तुम्हांस
वेढा घालणाऱ्या खास्द्यांस मिळेल तो जगेल, जीवा-
निशीं सुटेल. १० कारण मीं या नगराकडे तोंड केलें
आहे तें त्याच्या वाईटासाठीं, त्याच्या बऱ्यासाठीं नव्हे,
असें परमेश्वर म्हणतो; तें बाबेलच्या राजाच्या हातीं
जाईल, तो त्याला आग लावून देईल.

११ यहूदाच्या राजघराण्याविषयीं परमेश्वराचें वचन
ऐका: १२ परमेश्वर म्हणतो, हे दावीदघराण्या, रोज
सकाळीं इनसाफ कर, जुलम्याच्या हातांतून लुबाड-
लेल्यांस सोडीव; नाहीं तर तुझ्या कर्मांच्या दुष्टतेमुळें
माझा संताप अग्नीसारखा भडकेल. तो कोणाच्यानें
विझवणार नाहीं. १३ परमेश्वर म्हणतो, अगे खोऱ्यां-
तील व पठारावरील रहिवाशिणी: पाहा, जे तुम्ही
म्हणतां कीं आम्हांवर कोण चढाई करून येईल, आमच्या
वस्तींत येण्याची कोणाची छाती आहे, त्या तुमच्या-
विरुद्ध मी आहें. १४ परमेश्वर म्हणतो, तुमच्या करणीच्या
फळाप्रमाणें मी तुमचा समाचार घेईन; तिच्या वनांत मी
अग्नि पेटवीन, तो तिच्या आसपासचें सगळें भस्म करील.

## २२

१ परमेश्वर म्हणाला, यहूदाच्या राजाच्या
घरीं खालीं जा, आणि तेथें हें वचन बोल.
२ असें म्हण: दाविदाच्या सिंहासनावर बसणाऱ्या
यहूदाच्या राजा, तूं, तुझे दास व या वेशींनीं येजा
करणारे तुझे लोक असे तुम्ही परमेश्वराचें वचन ऐका.
३ परमेश्वर म्हणतो, तुम्ही न्यायनिवाडा करा;
जुलम्याच्या हातांतून लुबाडलेल्यांस सोडवा; परका,
पोरका व विधवा यांचा अन्याय करूं नका; त्यांस उपद्रव
करूं नका; या स्थळीं निर्दोष रक्त पाडूं नका. ४ तुम्ही
खरोखर असें कराल तर दाविदाच्या सिंहासनावर
बसणारे राजे, त्यांचे सेवक व त्यांचे लोक रथारूढ व
अश्वारूढ होऊन या मंदिराच्या वेशींनीं येजा करितील.
५ परमेश्वर म्हणतो, माझी शपथ, तुम्हीं हीं वचनें
ऐकलीं नाहींत तर हें मंदिर ओस पडेल. ६ कारण

यहूदाच्या राजघराण्याविषयीं परमेश्वर म्हणतो, तूं मला गिलाद, लबानोनाचें शिखर असें आहेस; मी तुला खातरीनें ओसाड भूमीसारखें, निर्जन नगरासारखें करीन.
७ मी तुजविरुद्ध विध्वंसक, त्यांच्या शस्त्रांनिशीं सिद्ध करीन; ते तुझे निवडक गंधसरू तोडून अग्नींत टाकितील.
८ बहुत राष्ट्रांतील लोक या नगराजवळून जातील; ते एकमेकांस म्हणतील कीं परमेश्वरानें या मोठ्या नगराचें असें कां केलें?
९ तेव्हां ते उत्तर देतील कीं त्यांनीं आपला देव परमेश्वर याचा करार मोडिला व अन्य देवांस भजून त्यांची सेवा केली म्हणून.

१० मृतासाठीं रडूं नका, त्याकरितां शोक करूं नका; तर देशांतर करणाऱ्यासाठीं आक्रोश करा; कारण तो परत येणार नाहीं, त्याला त्याच्या जन्मभूमीचें पुनः दर्शन होणार नाहीं.
११ यहूदाचा राजा योशीया याचा पुत्र शल्लूम[1] हा आपला बाप योशीया याच्या जागीं राजा होऊन या ठिकाणाहून गेला त्याजविषयीं परमेश्वर म्हणतो, तो येथें कधीं परत येणार नाहीं;
१२ तर जेथें त्याला बंदिवान करून नेलें आहे तेथेंच तो मरेल; या देशाचें दर्शन त्याला पुनः होणार नाहीं.

१३ जो आपलें घर अधर्मानें बांधितो, आपल्या माड्या अन्यायानें उभारितो, आपल्या शेजाऱ्याकडून फुकट सेवा घेतो, त्याला वेतन देत नाहीं, तो हायहाय करणार.
१४ तो म्हणतो, मी आपल्यासाठीं विस्तीर्ण घर व लांबरुंद माड्या बांधीन; तो त्याला बहुत खिडक्या पाडितो; त्यानें घरास गंधसरूची तक्तपोशी केली आहे, हिंगुळाचा रंग दिला आहे.
१५ तूं गंधसरूंची शेखी मिरवितोस म्हणून तूं राजा ठरशील काय? तुझा बाप खातपीत व धर्मन्याय करीत नसे काय? तेव्हां त्याचें बरें चाललें होतें.
१६ दीनदुबळ्यांचा तो न्यायनिवाडा करी तेव्हां त्याचें बरें चाललें होतें. परमेश्वर म्हणतो, हेंच मला जाणणें नव्हे काय?
१७ तरी पण केवळ निर्दोष्यांचा रक्तपात, जुलूमजबरी व अन्याय्य धनप्राप्ति यांकडे तुझे डोळे व मन हीं लागलीं आहेत.
१८ ह्या-

करितां यहूदाचा राजा योशीया याचा पुत्र यहोयाकीम[1] याच्याविषयीं परमेश्वर म्हणतो, अहारे माझ्या भावा, अहागे माझ्या बहिणी, असें म्हणून कोणी त्याजविषयीं विलाप करणार नाहींत; अहारे माझ्या धनी, अहारे त्याची थोरवी, असें म्हणून त्याजविषयीं कोणी विलाप करणार नाहींत.
१९ गाढवाच्या मूठमातीसारखी त्याची मूठमाती होईल; त्याचें शव यरुशलेमाच्या वेशींबाहेर ओढीत नेऊन फेकून देतील.

२० लबानोनावर चढून आक्रोश कर; बाशानांत हेल काढून रड; अबारीमाहून आरोळी कर; कारण तुझे सर्व वल्लभ भंगले आहेत.
२१ तुझी सुखसोय असतां मी तुजबरोबर बोललों तेव्हां तूं म्हणालीस, मी ऐकावयाची नाहीं. माझें म्हणणें ऐकूं नये ही लहानपणापासून तुला खोड आहे.
२२ वारा तुझ्या सर्व मेंढपाळांस उधळून लावील, तुझे वल्लभ बंदिवान होतील; तेव्हां तूं आपल्या सर्व दुष्टतेमुळें लज्जित व फजीत होशील.
२३ अगे लबानोनवासिनी, गंधसरूंवर घरटें करणारीे, तुला तिडका येतील; प्रसूत होणाऱ्या स्त्रीप्रमाणें तूं वेणा देशील तेव्हां तूं कशी धापा टाकिशील!
२४ परमेश्वर म्हणतो, माझ्या जीविताची शपथ, यहूदाचा राजा यहोयाकीम याचा पुत्र कोन्या माझ्या उजव्या हातांतील मुद्रिकेसारखा असला तरी तेथून मी तुला काढून फेकून देईन.
२५ तुझा जीव घेण्यास टपणाऱ्यांच्या हातीं, तुला ज्यांची भीति आहे त्यांच्या हातीं, बाबेलच्या राजा नबुखद्रेस्सर याच्या हातीं, खास्द्यांच्या हातीं मी तुला देईन.
२६ मी तुला व तुझ्या जन्म देणाऱ्या आईला तुमची जन्मभूमि नव्हे अशा देशांत फेकून देईन; तेथें तुम्ही मराल.
२७ ज्या देशांत परत येण्याची ते वांच्छा करितील त्यांत ते परत येणार नाहींत.
२८ हा कोन्या तुच्छ फुटक्या पात्रासारखा माणूस आहे काय? तो नापसंत पात्र आहे काय? त्याला व त्याच्या संतानाला माहीत नाहीं अशा देशांत त्यांस कां फेकून

[1] याचें नांव २ राजे २३:३० येथें यहोअहाज असें दिलें आहे; १ इतिहास ३:१५ ताडून पाहा.

[1] याचें नांव अ० २४:१ व १ इतिहास ३:१६ येथें यकोन्या आणि २ राजे २४:६, ८ येथें यहोयाखीन असें दिलें आहे.

दिलें आहे? २९ अगे पृथ्वी, अगे पृथ्वी, अगे पृथ्वी,
परमेश्वराचें वचन ऐक. ३० परमेश्वर म्हणतो, हें
लिहून ठेवा कीं हा मनुष्य निर्वंश आहे, हा मनुष्य
आपल्या सर्व हयातींत उत्कर्ष पावावयाचा नाहीं; कारण
दाविदाच्या सिंहासनावर बसून यहूदावर राज्य करण्याचें
यश त्याच्या वंशांतील कोणाला कधीं मिळणार नाहीं.

२३ १ जे मेंढपाळ माझ्या कुरणांतल्या कळपाचा
नाश करितात व त्यास विखरितात ते हाय-
हाय करितील असें परमेश्वर म्हणतो. २ ह्यामुळें
माझ्या लोकांस चारणाऱ्या मेंढपाळांविषयीं इस्रा-
एलाचा देव परमेश्वर म्हणतो, तुम्हीं माझा कळप
विखरिला आहे, त्यास हाकून लाविलें आहे, त्याचा
समाचार घेतला नाहीं; पाहा, मी तुमच्या कर्मांचा अनिष्ट
परिणाम तुम्हांवर आणून तुमचा समाचार घेईन असें
परमेश्वर म्हणतो. ३ मीं ज्या ज्या देशांत आपला
कळप हाकून लाविला त्या त्या देशांतून त्याचा अवशेष
जमा करीन व त्यांस त्यांच्या मेंढवाड्यांत परत
आणीन, म्हणजे ते फलद्रूप होऊन वृद्धि पावतील.
४ मी त्यांजवर मेंढपाळ नेमीन, ते त्यांस चारितील,
म्हणजे ते पुढें भिणार नाहींत, घाबरणार नाहींत,
कमी होणार नाहींत, असें परमेश्वर म्हणतो.

५ परमेश्वर म्हणतो, पाहा, मी दाविदाकरितां एक
धार्मिक अंकुर उगववीन; तो राजा होऊन राज्य
करील, तो सुज्ञतेनें वागेल, देशांत धर्मन्याय करील,
असे दिवस येत आहेत. ६ त्याच्या काळीं यहूदा
सुरक्षित होईल, इस्राएल निर्भय वसेल, व जें नांव
त्याला देतील तें हें: **परमेश्वर आमची धार्मि-
कता.** ७ परमेश्वर म्हणतो, यास्तव पाहा, असे दिवस
येत आहेत कीं त्यांत ज्या परमेश्वरानें इस्राएलवंशजांस
मिसर देशांतून आणिलें त्याच्या जीविताची शपथ असें
म्हणणार नाहींत; ८ तर उत्तर देशांतून व ज्या ज्या
देशांत इस्राएल घराण्याच्या संतानाला हाकून लाविलें
होतें त्यांतून ज्यानें त्यांस आणिलें त्या परमेश्वराच्या
जीविताची शपथ, असें म्हणतील व ते स्वतांच्या
देशांत राहतील.

९ संदेष्ट्यांविषयीं: माझें हृदय माझ्या ठायीं भग्न
झालें आहे; माझीं सर्व हाडें थरथर कांपत आहेत;
परमेश्वर व त्याचीं पवित्र वचनें यांमुळें मी मद्यप्यासारखा,
द्राक्षारसानें मस्त झालेल्या मनुष्यासारखा झालों आहें.
१० कारण जारकर्म्यांनीं देश व्यापिला आहे; शापामुळें
भूमि शोक करीत आहे; रानांतील कुरणें वाळलीं
आहेत; लोकांची गति वाईट आहे, त्यांचा पराक्रम
म्हटला तर अधर्म; ११ कारण संदेष्टा व याजक हे
दोघेहि भ्रष्ट आहेत; माझ्या मंदिरांत देखील मला
त्यांचें दुष्कर्म दिसून आलें आहे, असें परमेश्वर म्हणतो.
१२ ह्यामुळें अंधारांतल्या निसरड्या जागांप्रमाणें
त्यांचा मार्ग त्यांस होईल, ते ढकलले जाऊन त्यांत
पडतील; कारण मी त्यांच्यावर अरिष्ट, त्यांची खबर
घेण्याचा वर्षकाळ, आणीन असें परमेश्वर म्हणतो.
१३ शमरोनांतील संदेष्ट्यांच्या ठायीं मीं मूर्खपणा पाहिला
आहे; त्यांनीं बालदैवताच्या नांवानें भाषणें करून माझे
लोक इस्राएल यांस बहकविलें आहे. १४ यरुशलेमांतल्या
संदेष्ट्यांच्या ठायींहि मीं एक घोर प्रकार पाहिला आहे; ते
जारकर्म करितात व लबाडीनें चालतात; ते दुष्कर्म्यांचे
हात असे दृढ करितात कीं त्यांतला कोणी आपल्या
दुष्कर्मांपासून वळत नाहीं; ते सर्व मला सदोमासारखे झाले
आहेत, व त्याचे रहिवासी गमोरासारखे झाले आहेत.
१५ याकरितां सेनाधीश परमेश्वर संदेष्ट्यांविषयीं
म्हणतो, पाहा, मी त्यांस खावयास कडूदवणा व प्यावयास
विष देईन, कारण यरुशलेमाच्या संदेष्ट्यांपासून अधर्म
निघून देशभर पसरला आहे. १६ सेनाधीश परमेश्वर
म्हणतो, तुम्हांस संदेश देणाऱ्या संदेष्ट्यांचीं वचनें ऐकूं
नका, ते तुम्हांला फसवितात; ते आपल्याच मनाप्रमाणें
दृष्टांत सांगतात, परमेश्वराच्या मुखांतला सांगत नाहींत.
१७ मला तुच्छ मानणाऱ्यांस ते म्हणत राहतात कीं
परमेश्वर बोलला आहे: तुम्हांस शांति प्राप्त होईल;
आपल्या अंतःकरणाच्या हट्टाप्रमाणें चालणाऱ्या सर्वांस
ते म्हणतात कीं तुम्हांवर कांहीं अरिष्ट येणार नाहीं.
१८ कारण त्यांच्यापैकीं परमेश्वराचा शब्द ओळखणारा
व ऐकणारा असा त्यांच्या मंत्रिमंडळांत कोण होता?

माझ्या वचनाकडे लक्ष देऊन तें कोणीं ऐकलें ?
१९ पाहा, परमेश्वरापासून त्याचें क्रोधरूप तुफान सुटलें
आहे; गरगर फिरणारी वावटळ दुष्टांच्या डोक्यावर
आदळेल. २० परमेश्वर आपलें कार्य करीपर्यंत, आपला
मनोदय पूर्ण करीपर्यंत, त्याचा संताप फिरावयाचा
नाहीं; पुढील काळीं तुम्हांला हें चांगलें समजेल. २१ मीं
ह्या संदेष्ट्यांस पाठविलें नाहीं तरी ते धावत सुटले;
मी त्यांजबरोबर बोललों नाहीं तरी त्यांनीं संदेश दिला;
२२ पण ते माझ्या मंत्रिमंडळांत असते तर त्यांनीं
माझीं वचनें माझ्या लोकांस विदित केलीं असतीं आणि
त्यास त्यांच्या दुष्ट मार्गांतून व त्यांच्या कर्मांच्या दुष्टते-
पासून फिरविलें असतें. २३ परमेश्वर म्हणतो, मी
जवळचा मात्र देव आहें आणि दूरचा देव नव्हे काय ?
२४ परमेश्वर म्हणतो, माझ्या दृष्टीस पडणार नाहीं
अशा गुप्त स्थळीं कोणास लपतां येईल काय ? मी
आकाश व पृथ्वी व्यापून राहत नाहीं काय ? असें
परमेश्वर म्हणतो. २५ मीं स्वप्न पाहिलें आहे, स्वप्न
पाहिलें आहे, असें म्हणून माझ्या नांवानें असत्य
संदेश देतात; ते संदेष्टे काय बोलतात तें मीं ऐकलें
आहे. २६ माझ्या नांवानें असत्य संदेश देणारे ते
संदेष्टे आपल्या मनांतलें कपट संदेशरूपानें कथन
करितात, हें कोठवर चालणार ? २७ त्यांचे पूर्वज
बालदैवतामुळें माझें नाम विसरले, तसें ते आपलीं
स्वप्नें एकमेकांस सांगून माझ्या लोकांस माझें नाम
विसरावयास लावितील अशी त्यांची कल्पना आहे.
२८ कोणा संदेष्ट्यानें स्वप्न पाहिलें असेल तर तें तो
कथन करो; माझें वचन कोणाजवळ असेल तर सत्याला
स्मरून तो तें माझें वचन सांगो. गव्हापुढें पेंढा तो
काय ? असें परमेश्वर म्हणतो. २९ परमेश्वर म्हणतो,
माझें वचन अग्नीसारखें, खडकाला फोडून तुकडेतुकडे
करणाऱ्या हातोड्यासारखें नव्हे काय ?

३० ह्यामुळें पाहा, जे संदेष्टे एकमेकांपासून माझीं
वचनें चोरून घेतात त्यांच्याविरुद्ध मी आहें. ३१ पाहा,
जे आपली जीभ चालवून म्हणतात कीं हें देवाचें वचन
आहे, त्यांच्याविरुद्ध मी आहें, असें परमेश्वर म्हणतो,
३२ परमेश्वर म्हणतो, पाहा, जे संदेष्टे खोटीं स्वप्नें
संदेश म्हणून सांगतात त्यांच्याविरुद्ध मी आहें; ते
माझ्या लोकांस आपल्या लबाडीनें व आपल्या अमर्याद
भाषणानें बहकवितात; मीं तर त्यांस पाठविलें नाहीं व
आज्ञापिलेंहि नाहीं; ते या लोकांचें बिलकूल हित करीत
नाहींत, असें परमेश्वर म्हणतो. ३३ जेव्हां हे लोक, अगर
एखादा संदेष्टा किंवा याजक तुला विचारील कीं परमे-
श्वराचें भारी वचन काय आहे ? तेव्हां त्यांस म्हण,
तुम्ही भारी आहां आणि मीच तुम्हांस टाकून देईन
असें परमेश्वर म्हणतो. ३४ कोणी संदेष्टा, याजक किंवा
लोकांतला कोणी, परमेश्वराचें भारी वचन, हे शब्द
उच्चारील तर मी त्या माणसाला व त्याच्या
घराण्याला शिक्षा करीन. ३५ तर तुम्हांपैकीं एकानें
आपल्या शेजाऱ्याला व आपल्या बांधवाला म्हणावें,
परमेश्वरानें काय उत्तर केलें ? परमेश्वर काय
बोलला ? ३६ तुम्हीं यापुढें, परमेश्वराचें भारी
वचन, असें म्हणूं नये, कारण प्रत्येकाचें वचन त्याला
स्वतांला भारी आहे; तुम्हीं तर जीवंत देवाचीं,
सेनाधीश परमेश्वर आमचा देव याचीं, वचनें विपरीत
केलीं आहेत. ३७ तूं संदेष्ट्याला विचार कीं परमेश्वरानें
तुला काय उत्तर दिलें ? परमेश्वर काय बोलला ?
३८ तरी पण परमेश्वराचें भारी वचन असेंच तुम्ही
बोलत राहाल तर, परमेश्वर म्हणतो, ज्या अर्थी तुम्ही
परमेश्वराचें भारी वचन हे शब्द बोलत राहतां व तुम्हीं,
परमेश्वराचें भारी वचन, हे शब्द बोलूं नका म्हणून
मीं तुम्हांस सांगून पाठविलें, ३९ त्या अर्थी पाहा, मी
तुम्हांला अगदीं विसरेन, मी तुम्हांस आणि जें नगर
तुम्हांस व तुमच्या पूर्वजांस दिलें त्यांस माझ्या नजरे-
समोरून झुगारून देईन; ४० आणि तुम्हांस सर्वकाळचा
कलंक लावीन; जिचा कधीं विसर पडणार नाहीं
अशी तुमची सतत अप्रतिष्ठा करीन.

२४ १ यहोयाकीम याचा पुत्र यकोन्या जो यहूदा-
चा राजा त्यास व यहूदाचे सरदार, कारागीर व
लोहार यांस नबुखद्नेस्सरानें धरून यरुशलेमांतून

बाबेलास नेल्यानंतर परमेश्वरानें मला हें दाखविलें;
पाहा, परमेश्वराच्या मंदिरासमोर अंजिरांच्या दोन
टोपल्या ठेविल्या होत्या. २ एका टोपलींत पहिल्या
बाराच्या अंजिरांसारखे फार चांगले अंजीर होते; दुसऱ्या
टोपलींत फार वाईट अंजीर होते, एवढे कीं ते खावया-
जोगे नव्हते. ३ परमेश्वर मला म्हणाला, यिर्मया, तुला
काय दिसतें? मी म्हणालों, अंजीर; चांगले ते फार
चांगले आहेत आणि वाईट ते फार वाईट आहेत, एवढे
कीं ते खावयाजोगे नाहींत. ४ मग परमेश्वराचें वचन
मला प्राप्त झालें कीं ५ इस्राएलाचा देव परमेश्वर
म्हणतो, या ठिकाणाहून यहूदाचे बंदिवान केलेले जे
लोक मीं खास्द्यांच्या देशीं पाठविले आहेत त्यांस या
चांगल्या अंजिरांप्रमाणें मी समजेन. ६ मी त्यांजवर
कृपादृष्टि करीन; आणि त्यांस या देशीं परत आणीन;
त्यांस उभारीन, पाडून टाकणार नाहीं; त्यांची लागवड
करीन, त्यांस उपटून टाकणार नाहीं. ७ मी परमेश्वर
आहें असें मला ओळखणारें हृदय मी त्यांस देईन; ते
माझे लोक होतील व मी त्यांचा देव होईन; कारण ते
आपल्या मनापासून मजकडे वळतील. ८ परमेश्वर
खरोखर म्हणतो, खावयाजोगे नाहींत असे जे वाईट
अंजीर आहेत त्यांप्रमाणें यहूदाचा राजा सिद्कीया व
त्याचे सरदार, आणि या देशांत राहिलेले व मिसर
देशांत वस्ती करून राहिलेले यरुशलेमाचे अवशिष्ट
लोक यांचें मी करीन; ९ त्यांचें वाईट होईल; पृथ्वी-
वरल्या सर्व राष्ट्रांना दहशत पोहंचेल असें मी त्यांचें
करीन; आणि जेथें मी त्यांस हाकून देईन तेथें ते
अपशब्द व लोकप्रवाद, निंदा व शाप यांचे विषय
होतील; १० आणि मी त्यांच्यामध्यें तरवार, दुष्काळ
व मरी पाठवीन, अशी कीं जो देश मीं त्यांस व त्यांच्या
पूर्वजांस दिला त्यांतून त्यांचा नायनाट होईल.

२५ १ यहूदाचा राजा योशीयाचा पुत्र यहोया-
कीम याच्या कारकीर्दीच्या चौथ्या वर्षी, म्हणजे
बाबेलचा राजा नबुखद्रेस्सर याच्या कारकीर्दीच्या
पहिल्या वर्षी यहूदाच्या सर्व लोकांविषयीं यिर्मयाला
जें वचन प्राप्त झालें तें हें: २ यिर्मया संदेष्ट्यानें यहू-
दाचे सर्व लोक व सर्व यरुशलेमनिवासी यांस सांगितलें
कीं ३ यहूदाचा राजा आमोनाचा पुत्र योशीया याच्या
कारकीर्दीच्या तेराव्या वर्षापासून आजवर तेवीस वर्षें
परमेश्वराचें वचन मला प्राप्त होत असून तें मी तुम्हांस
सांगत आलों, मोठ्या निकडीनें सांगत आलों; तरी
तुम्हीं तें ऐकलें नाहीं. ४ परमेश्वर आपले सर्व सेवक जे
संदेष्टे त्यांस तुम्हांकडे पाठवीत आला, मोठ्या निकडीनें
पाठवीत आला; तरी तुम्हीं ऐकलें नाहीं, आपला
कान लाविला नाहीं. ५ ते म्हणाले, तुम्ही सगळे आपल्या
कुमार्गापासून, आपल्या कर्मांच्या दुष्टतेपासून फिरा,
म्हणजे परमेश्वरानें तुम्हांस व तुमच्या पूर्वजांस जो देश
युगानुयुग दिला आहे त्यांत तुम्ही राहाल; ६ अन्य
देवांची सेवा करण्यास व त्यांचें भजनपूजन करण्यास
त्यांच्यामागें जाऊं नका, म्हणजे तुम्ही आपल्या हातच्या
कृतीनें मला संताप आणणार नाहीं व मी तुमचें वाईट
करणार नाहीं. ७ तरी आपल्या हातच्या कृतीनें
मला संताप आणून आपलें नुकसान करून घ्यावें म्हणून
तुम्ही माझें ऐकलें नाहीं, असें परमेश्वर म्हणतो. ८ यास्तव
सेनाधीश परमेश्वर म्हणतो, तुम्हीं माझीं वचनें ऐकलीं
नाहींत, ९ म्हणून पाहा, मी उत्तरेकडील सर्व राष्ट्रांना व
माझा सेवक बाबेलचा राजा नबुखद्रेस्सर याला बोलावून
आणितों, असें परमेश्वर म्हणतो; त्यांस या देशावर,
त्यांतील रहिवाश्यांवर आणि आसपासच्या या सर्व
राष्ट्रांवर आणितों; मी त्यांचा अगदीं नाश करून तीं
विस्मयास व उपहासास पात्र आणि कायमचीं उजाड
करीन. १० त्यांमधून आनंदाचा व उल्हासाचा शब्द,
नवऱ्याचा व नवरीचा शब्द, जात्याचा आवाज व
दिव्याचा प्रकाश हीं नाहींतशीं करीन; ११ हा सगळा देश
वैराण आणि विस्मयाला कारण होईल, आणि हीं राष्ट्रें
सत्तर वर्षें बाबेलच्या राजांचें दास्य करितील. १२ तथापि
सत्तर वर्षें भरल्यावर असें होईल कीं बाबेलचा राजा,
तेथील लोक व खास्द्यांचा देश यांस त्यांच्या दुष्कर्मांचें
प्रतिफळ मी देईन व तो देश कायमचा ओसाड करीन,
असें परमेश्वर म्हणतो. १३ मी त्या देशाविषयीं जीं

वचनें बोललों आहें, आणि सर्व राष्ट्रांविषयीं यिर्मयानें या
संदेशग्रंथांत जें लिहून ठेविलें आहे त्याप्रमाणें सर्व कांहीं
त्या देशावर आणीन. १४ त्यांच्याकडूनहि अनेक राष्ट्रें व
थोर राजे दास्य करवून घेतील; मी त्यांच्या कृतींप्रमाणें
व त्यांच्या हातच्या कर्माप्रमाणें त्यांस प्रतिफळ देईन.
१५ परमेश्वर, इस्राएलाचा देव, मला म्हणाला कीं,
माझ्या हातून संतापरूप द्राक्षारसाचा हा पेला घे व
ज्या सर्व राष्ट्रांकडे मी तुला पाठवितों त्यांस तो पाज;
१६ म्हणजे ते तो पितील, आणि त्यांच्यामध्यें मी
तरवार पाठवीन तिच्यामुळें ते तेथें झोकांड्या खातील
व वेडे बनतील. १७ तेव्हां परमेश्वराच्या हातून मीं
तो पेला घेतला व ज्या राष्ट्रांकडे परमेश्वरानें मला
पाठविलें त्या सर्वांस तो पाजिला; १८ म्हणजे यरु-
शलेम व यहूदाचीं नगरें हीं उध्वस्त व्हावीं आणि
राजे व सरदार विस्मय, उपहास व शाप यांचे विषय
व्हावे म्हणून त्यांस तो पाजिला; आज त्यांची तशी
स्थिति आहे. १९ मिसर देशाचा राजा फारो, त्याचे
सेवक, त्याचे सरदार व त्याचे सर्व लोक यांस,
२० सर्व मिश्र जातींस, ऊस देशांतील सर्व राजांस आणि
पलिष्टी देशांतील अश्कलोन, गज्जा, एक्रोन व अश्दोदाचें
अवशेष यांच्या सर्व राजांस, २१ अदोम, मवाब
व अम्मोनी लोक यांस, २२ सोर व सीदोन
यांचे सर्व राजे व समुद्रापलीकडील देशांचे
राजे यांस, २३ ददान, तेमा, बूज व केसांची
चोंच काढणारे या सर्वांस, २४ अरबस्तानांतले सर्व
राजे व रानांत वसणाऱ्या सर्व मिश्र जातींचे सर्व
राजे यांस, २५ जिम्री, एलाम व मेदी यांच्या
सर्व राजांस, २६ परस्परांपासून दूर व जवळ
असलेले उत्तरेकडचे सर्व राजे व या भूतलावर
असलेलीं पृथ्वीवरचीं सर्व राज्यें, यांस तो पेला पाजिला.
यांच्यामागून शेशखचा राजाहि तो पिईल. २७ सेना-
धीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, तूं त्यांस
सांग, मी तुम्हांमध्यें तरवार पाठवितों म्हणून प्या,
मस्त व्हा, वांति करा, पडा, पुन: उठूं नका. २८ जर
ते तुझ्या हातून तो पेला घेऊन पिण्यास अमान्य झाले
तर त्यांस सांग, सेनाधीश परमेश्वर म्हणतो, तुम्हांला तो
प्यावा लागेलच. २९ कारण पाहा, ज्या नगराला मीं
आपलें नाम दिलें आहे त्यावरहि मी अनिष्ट आणितों;
तर तुम्ही अगदीं शिक्षेवांचून राहाल काय ? तुम्हांस
शिक्षा झाल्यावांचून राहणार नाहीं, कारण पृथ्वीच्या
सर्व रहिवाश्यांस मारण्यासाठीं मी तरवार बोलावीत आहें,
असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो. ३० यास्तव तूं त्यांस
या सर्व वचनांचा संदेश सांग; त्यांस असें सांग कीं
परमेश्वर उच्चस्थलावरून गर्जना करील; तो आपल्या
पवित्र निवासांतून शब्द उच्चारील; तो आपल्या कळपा-
वर गर्जना करील; द्राक्षें तुडविणाऱ्यांप्रमाणें तो पृथ्वीच्या
सर्व रहिवाश्यांविरुद्ध आरोळी करील. ३१ पृथ्वीच्या
दिगंतापर्यंत हा गोंगाट पोहंचला आहे; कारण मी
परमेश्वर राष्ट्रांशीं प्रतिवाद करीत आहें, मी सर्व
मानवजातीबरोबर वाद चालीत आहें, व दुष्टांस
तरवारीच्या स्वाधीन करीत आहें, असें परमेश्वर
म्हणतो.

३२ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, पाहा, राष्ट्राराष्ट्रांतून
अनिष्ट फिरत आहे, पृथ्वीच्या अति दूरच्या प्रदेशांतून
मोठें तुफान उठवेल. ३३ त्या दिवशीं परमेश्वरानें संहा-
रिलेले, पृथ्वीच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत पडून
राहतील; त्यांकरितां कोणी शोक करणार नाहीं, त्यांस
कोणी उचलणार नाहीं, पुरणार नाहीं; ते भूमीला खत
होतील. ३४ मेंढपाळहो, हायहाय करा, ओरडा;
कळपांचे प्रमुखहो, राखेंत लोळा; कारण तुमच्या
वधाचे दिवस भरले आहेत, मोलवान् भांडें पडून भंगतें
तसे तुम्ही पडाल; अशी मी तुमची दाणादाण करीन.
३५ मेंढपाळांस पळावयाला मार्ग राहणार नाहीं, कळपांचे
प्रमुख निभावणार नाहींत. ३६ मेंढपाळांची आरोळी
ऐका ! कळपाच्या प्रमुखांची हायहाय ऐका ! कारण
परमेश्वर त्यांचें कुरण उद्ध्वस्त करीत आहे. ३७ परमे-
श्वराच्या संतप्त क्रोधामुळें शांतिमय कुरणें सामसूम
झालीं आहेत. ३८ तरुण सिंहाप्रमाणें त्यानें आपली
जाळी सोडिली आहे; क्लेश देणाऱ्या तरवारीनें

१ अथवा: बाबेलचा ( ५१:४१ पाहा )

त्यांच्या क्रोधाच्या संतापानें त्यांचा देश उजाड
झाला आहे.

१ यहूदाचा राजा योशीयाचा पुत्र यहोया-
२६ कीम याच्या कारकीर्दीच्या आरंभीं परमेश्वरापासून
हें वचन प्राप्त झालें: २ परमेश्वर म्हणतो,
परमेश्वराच्या मंदिराच्या अंगणांत उभा राहा, व यहूदा-
च्या सर्व नगरांतून जे परमेश्वराच्या मंदिरांत भजन-
पूजन करण्यास येतात त्यांस जे शब्द बोलण्याची मीं तुला
आज्ञा केली आहे ते सर्व त्यांस सांग, एक शब्दहि गाळूं
नको. ३ न जाणो ते कदाचित् ऐकतील व त्यांतला प्रत्येक
जण आपल्या कुमार्गापासून फिरेल, म्हणजे मग त्यांच्या
कृतींच्या दुष्टतेमुळें त्यांजवर जें अनिष्ट आणण्याचें मीं
योजिलें आहे त्याविषयीं मला अनुताप होईल. ४ त्यांस
सांग कीं परमेश्वर असें म्हणतो, तुम्ही माझें ऐकणार
नाहीं, मीं तुम्हांपुढें ठेविलेल्या नियमांप्रमाणें तुम्ही
चालणार नाहीं, ५ माझे सेवक जे संदेष्टे त्यांस मीं
मोठ्या निकडीनें तुम्हांकडे पाठविलें असतां त्यांचें
तुम्हीं ऐकलें नाहीं, त्यांचीं वचनें आतां तुम्हीं
ऐकणार नाहीं; ६ तर मी हें मंदिर शिलोसारखें
करीन, आणि हें नगर पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांना
शापमूलक करीन. ७ हीं वचनें परमेश्वराच्या
मंदिरांत यिर्मयाला बोलतांना याजकांनीं, संदेष्ट्यांनीं व
सर्व लोकांनीं ऐकलें. ८ तीं वचनें सर्व लोकांना कळ-
वावीं म्हणून यिर्मयास परमेश्वरानें सांगितलें होतें; तीं
सर्व त्यानें बोलण्याचीं संपविल्यावर याजकांनीं, संदेष्ट्यांनीं
व सर्व लोकांनीं यिर्मयास पकडून म्हटलें, तूं मेलाच
पाहिजेस. ९ हें मंदिर शिलोप्रमाणें होईल व हें नगर
उजाड व निर्जन होईल असा संदेश तूं परमेश्वराच्या
नामानें कां दिला? मग सर्व लोक परमेश्वराच्या
मंदिरांत यिर्मयाच्या भोंवतीं जमले.
१० हें ऐकल्यावर यहूदाचे सरदार राजगृहांतून
परमेश्वराच्या मंदिरांत आले व परमेश्वराच्या मंदिराच्या
नवीन द्वाराच्या देवडींत बसले. ११ तेव्हां याजक व
संदेष्टे सरदारांस व सर्व लोकांस म्हणाले, हा मनुष्य
मरणदंडास पात्र आहे, कारण या नगराविरुद्ध यानें
संदेश दिला तो तुम्हीं आपल्या कानांनीं ऐकला आहे.
१२ मग यिर्मया सर्व सरदारांस व सर्व लोकांस म्हणाला,
जीं संदेशवचनें तुम्हीं ऐकलीं तीं सर्व या मंदिरा-
विरुद्ध व या नगराविरुद्ध सांगावीं म्हणून परमेश्वरानें
मला पाठविलें. १३ यास्तव आतां तुम्ही आपले मार्ग व
आपलीं कर्मे सुधारा, परमेश्वर तुमचा देव याची वाणी
तुम्ही ऐका, म्हणजे तुम्हांवर जें अरिष्ट आणीन असें
परमेश्वर बोलला त्याविषयीं त्यास अनुताप होईल.
१४ माझ्याविषयीं म्हणाल तर पाहा, मी तुमच्या हातीं
आहें; तुम्हांला बरें व नीट दिसेल तसें माझें करा.
१५ एवढें मात्र पक्कें समजा कीं तुम्ही मला जिवें
माराल तर तुम्ही आपणांवर, ह्या नगरावर व यांतील
रहिवाश्यांवर निर्दोष रक्त पाडिल्याचा दोष आणाल;
कारण वास्तविक हीं सर्व वचनें तुमच्या कानीं पडावीं
म्हणून परमेश्वरानें मला तुम्हांकडे पाठविलें आहे.
१६ तेव्हां सरदार व सर्व लोक याजकांस व संदेष्ट्यांस
म्हणाले, हा मनुष्य मरणदंडास पात्र नाहीं; कारण
परमेश्वर आमचा देव याच्या नामानें तो आम्हांबरोबर
बोलला आहे. १७ यावर देशांतले कांहीं वडील उठून सर्व
सभाजनांस म्हणाले, १८ यहूदाचा राजा हिज्कीया
याच्या काळीं मीखा[1] मोरेष्टकर यानें संदेश दिला; तो
यहूदाच्या सर्व लोकांस म्हणाला, सेनाधीश परमेश्वर
म्हणतो, सीयोन शेताप्रमाणें नांगरितील, यरुशलेम
ढिगार होईल व मंदिराचा पर्वत जंगलानें भरलेला
उंचवटा होईल. १९ यहूदाचा राजा हिज्कीया व सर्व
यहूदा यांनीं त्याला ठार केलें काय? त्यानें परमेश्वराचें
भय धरून परमेश्वराचा प्रसाद मागितला नाहीं काय?
त्यांजवर अरिष्ट आणीन असें परमेश्वरानें म्हटलें होतें
त्याविषयीं त्याला अनुताप झाला. तर मग अशानें आपण
आपल्या जिवाची मोठी हानि करीत आहों. २० परमे-
श्वराच्या नामानें संदेश सांगणारा असाच आणखी एक
मनुष्य होता, त्याचें नांव उरीया; हा कीर्याथ-यारीमकर
शमायाचा पुत्र; त्यानें यिर्मयानें सांगितलेल्या सर्व वचनां-

[1]अथवा: मीखाया

प्रमाणेंच या नगराविरुद्ध व या देशाविरुद्ध संदेश दिला;
२१ यहोयाकीम राजा, त्याचे सर्व वीर व सर्व सरदार
यांनीं त्याचीं वचनें ऐकलीं तेव्हां राजानें त्यास ठार
मारावयास पाहिलें; तों उरीया हें ऐकून भ्याला व पळून
मिसर देशांत गेला. २२ मग यहोयाकीमानें मिसर
देशांत माणसें पाठविलीं; त्यानें अखबोराचा पुत्र एलना-
थान याच्याबरोबर कांहीं माणसें देऊन त्यास मिसर
देशांत पाठविलें. २३ त्यांनीं उरीयाला मिसर देशांतून
धरून आणिलें व यहोयाकीम राजाकडे नेलें; राजानें
त्याला तरवारीनें ठार करून त्याचें शव साधारण लोकांच्या
कबरेंत टाकून दिलें. २४ शाफानाचा पुत्र अहीकाम
याचें यिर्मयाला पाठबळ होतें, म्हणून तो लोकांच्या
हातीं लागला नाहीं, व त्यांनीं त्याला ठार मारिलें नाहीं.

१ यहूदाचा राजा योशीयाचा पुत्र सिद्कीया
२७ याच्या कारकीर्दीच्या आरंभीं यिर्मयाला
परमेश्वराचें हें वचन प्राप्त झालें: २ परमेश्वर
मला म्हणाला, तूं आपणासाठीं बंधनें व जूं तयार करून
आपल्या मानेवर ठेव; ३ आणि तीं यहूदाचा राजा
सिद्कीया याजकडे यरुशलेमास जे जासूद आले आहेत
त्यांच्या हस्तें अदोमाचा राजा, मवाबाचा राजा,
अम्मोन्यांचा राजा, सोराचा राजा आणि सीदोनाचा राजा
यांच्याकडे पाठीव; ४ आणि त्यांना त्यांच्या धन्यांकडे
असा निरोप देऊन पाठीव कीं सेनाधीश परमेश्वर,
इस्राएलाचा देव म्हणतो, तुम्ही आपल्या धन्यांस हें
सांगा, ५ मीं आपल्या महाशक्तीनें, आपले बाहु उभारून
पृथ्वी आणि पृथ्वीच्या पाठीवर असलेलीं मनुष्यें व पशु
यांस निर्माण केलें आहे, व मला नीट दिसेल त्यास तीं मी
देतों. ६ आतां हे सर्व देश मीं आपला सेवक बाबेलचा
राजा नबुखद्नेस्सर याच्या हातीं दिले आहेत; त्याची
सेवाचाकरी करण्यास वनांतील पशुहि मीं त्याला दिले
आहेत. ७ सर्व राष्ट्रें त्याची सेवा करितील, त्याच्या
पुत्रपौत्रांचीहि सेवा करितील; मग त्याच्या
देशाची वेळ येईल तेव्हां बहुत राष्ट्रें व थोर राजे
त्याजकडून सेवा करवून घेतील. ८ बाबेलचा राजा
नबुखद्नेस्सर याची सेवा जें राष्ट्र व राज्य करणार
नाहीं आणि बाबेलच्या राजाच्या जोखडाला मान
देणार नाहीं, अशा राष्ट्राचा त्याच्या हातून मी अंत
करीपर्यंत तरवार, दुष्काळ आणि मरी यांनीं मी समा-
चार घेईन. ९ तुमचे संदेष्टे, तुमचे दैवज्ञ, तुमचे स्वप्न-
द्रष्टे, तुमचे मांत्रिक व तुमचे जादूटोणा करणारे तुम्हांस
म्हणतात कीं बाबेलच्या राजाची सेवा करूं नका; त्यांचें
तुम्ही ऐकूं नका; १० कारण मीं तुम्हांस तुमच्या
देशांतून घालवावें, तुम्हांस हाकून लावावें व तुम्हीं नष्ट
व्हावें म्हणून ते तुम्हांस खोटा संदेश देतात.
११ तथापि जे कोणी बाबेलच्या राजाच्या जोखडाला
आपली मान देतील व त्याची सेवा करितील त्यांस मी
त्यांच्याच देशांत राहूं देईन; ते शेतकी करितील व
देशांत वस्ती करितील, असें परमेश्वर म्हणतो.

१२ या सर्व वचनांप्रमाणें यहूदाचा राजा सिद्कीया
यास मी म्हणालों कीं बाबेलच्या राजाच्या जोखडाला
आपली मान द्या, त्याची व त्याच्या लोकांची सेवा
करा म्हणजे तुम्ही जगाल. १३ जें राष्ट्र बाबेलच्या
राजाची सेवा करणार नाहीं त्याविषयीं परमेश्वरानें
सांगितलें आहे कीं तरवार, दुष्काळ आणि मरी यांनीं तें
मरेल, त्याप्रमाणें तूं व तुझे लोक कां मरतां? १४ जे
संदेष्टे तुम्हांस सांगतात कीं तुम्ही बाबेलच्या राजाची
सेवा करूं नका त्यांचीं वचनें ऐकूं नका; कारण ते
तुम्हांस खोटा संदेश देतात. १५ परमेश्वर म्हणतो,
मीं त्यांस पाठविलें नाहीं, पण ते माझ्या नामानें
खोटा संदेश देतात, यास्तव मी तुम्हांस व तुम्हांला
संदेश देणाऱ्या संदेष्ट्यांस हाकून देईन आणि तुम्ही
नष्ट व्हाल; १६ तसेंच मी याजकांस व सर्व लोकांस
म्हणालों: परमेश्वर म्हणतो, जे तुमचे संदेष्टे तुम्हांस
सांगतात कीं पाहा, परमेश्वराच्या मंदिराचीं पात्रें लव-
करच बाबेलहून परत आणण्यांत येतील त्यांचें हें बोलणें
ऐकूं नका; कारण ते तुम्हांस खोटा संदेश देतात.
१७ त्यांचें ऐकूं नका; बाबेलच्या राजाची सेवा
करून आपला जीव वांचवा; या नगराची नासाडी कां
व्हावी? १८ ते जर संदेष्टे असले व परमे-

प्रमाणें वचन त्यांच्याजवळ असलें तर परमेश्वराच्या
मंदिरांत, यहूदाच्या राजगृहांत व यरुशलेमांत जीं पात्रें
उरलीं आहेत तीं बाबेलास जाऊं नयेत अशी त्यांनीं
सेनाधीश परमेश्वराकडे विनंती करून पाहावी.
१९ गंगाळसागर, स्तंभ, गंगाळाच्या बैठकी व इतर पात्रें
या नगरांत उरलीं होतीं त्यांविषयीं सेनाधीश परमेश्वर
याप्रमाणें म्हणतो; २० बाबेलचा राजा नबुख-
द्रेस्सर यानें यहूदाचा राजा यहोयाकीमाचा पुत्र
यकन्या यास यहूदा व यरुशलेम यांतील सर्व सरदारां-
सह पकडून यरुशलेमांतून बाबेलास नेलें तेव्हां
त्यानें पात्रें नेलीं नव्हतीं; २१ हीं जीं पात्रें परमेश्वराच्या
मंदिरांत, यहूदाच्या राजगृहांत व यरुशलेमांत राहिलीं
होतीं त्यांविषयीं सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव
म्हणतो कीं २२ तीं बाबेलास नेण्यांत येतील व मी त्यांचा
समाचार घेईपर्यंत तीं तेथेंच राहतील; मग मी तीं तेथून
घेऊन या स्थलीं परत आणीन असें परमेश्वर म्हणतो.

२८ १ नंतर असें झालें कीं त्याच वर्षी यहूदाचा
राजा सिद्कीया याच्या कारकीर्दीच्या आरंभीं
चौथ्या वर्षाच्या पांचव्या महिन्यांत गिबोनकर
संदेष्टा हनन्या बिन अज्जूर यानें परमेश्वराच्या मंदिरांत
याजकांसमोर व सर्व लोकांसमोर मला असें सांगितलें
कीं २ सेनाधीश परमेश्वर इस्राएलाचा देव असें म्हणतो,
मीं बाबेलच्या राजाचें जूं मोडून टाकिलें आहे. ३ बाबेलचा
राजा नबुखद्रेस्सर यानें परमेश्वराच्या मंदिरांतलीं जीं
पात्रें या स्थलांतून घेऊन बाबेलास नेलीं तीं सर्व दोन
वर्षांच्या आंत मी या स्थळीं परत आणीन; ४ यहूदाचा
राजा यकन्या बिन यहोयाकीम व बाबेलास पकडून
नेलेले यहूदाचे सर्व लोक यांस मी या
ठिकाणीं परत आणीन, असें परमेश्वर म्हणतो;
कारण मी बाबेलच्या राजाचें जूं मोडून टाकीन.
५ तेव्हां जे याजक व जे सर्व लोक परमेश्वराच्या
मंदिरांत उभे होते त्यांच्यासमक्ष यिर्मया संदेष्टा
हनन्या संदेष्टयास म्हणाला, ६ आमेन, परमेश्वर
असें करो! परमेश्वराच्या मंदिरांतलीं पात्रें व बंदिवासां-
तले सर्व लोक बाबेलाहून या स्थळीं परत आणण्या-
विषयीं जीं वचनें तूं संदेशरूपानें सांगितलीं
त्यांप्रमाणें परमेश्वर करो. ७ मात्र जें वचन मी तुझ्या
कानीं व सर्व लोकांच्या कानीं पाडितों तें ऐक.
८ माझ्या व तुझ्यापूर्वी जे संदेष्टे प्राचीन काळापासून
होऊन गेले त्यांनीं, अनेक देश व मोठीं राज्यें यांवर
लढाई, अरिष्ट व मरी हीं येतील असा त्यांविरुद्ध संदेश
दिला. ९ कोणी संदेष्टा शांतीचा संदेश देतो तेव्हां त्या
संदेष्टयाचें वचन प्रत्ययास आलें म्हणजे समजावें कीं
खरोखर परमेश्वरानें त्यास पाठविलें आहे. १० तेव्हां
हनन्या संदेष्टयानें यिर्मया संदेष्टयाच्या मानेवर अस-
लेलें जोखड काढून मोडिलें; ११ आणि तो सर्व
लोकांसमक्ष म्हणाला, परमेश्वर म्हणतो, याचप्रमाणें
बाबेलचा राजा नबुखद्रेस्सर याचें जूं मी पुन्हा दोन
वर्षांच्या आंत सर्व राष्ट्रांच्या मानेवरून उतरून मोडून
टाकीन. मग यिर्मया संदेष्टा आपल्या वाटेनें गेला.

१२ यिर्मया संदेष्टयाच्या मानेवरून जोखड काढून
हनन्या संदेष्टयानें मोडिल्यावर यिर्मयाला परमेश्वराचें
वचन प्राप्त झालें तें असें: १३ जा, हनन्याला सांग कीं
परमेश्वर म्हणतो, तूं लाकडी जोखडें मोडून टाकिलीं
पण त्यांच्याऐवजीं लोखंडी जोखडें मी करीन.[1]
१४ कारण सेनाधीश परमेश्वर इस्राएलाचा देव म्हणतो,
या सर्व राष्ट्रांनीं बाबेलचा राजा नबुखद्रेस्सर याची सेवा
करावी म्हणून मीं त्यांच्या मानेवर लोखंडी जूं ठेविलें
आहे; त्यांस त्याची सेवा करावी लागेल, मीं त्यास वनांतले
पशुहि दिले आहेत. १५ मग यिर्मया संदेष्टा हनन्या
संदेष्टयाला म्हणाला, हनन्या, आतां हें ऐक; परमे-
श्वरानें तुला पाठविलें नाहीं; तूं या लोकांस लबाडीवर
भरंवसा ठेवावयास लाविलें; १६ याकरितां परमेश्वर असें
म्हणतो, मी तुला भूपृष्ठावरून काढून टाकीन; तूं
परमेश्वराविरुद्ध फितुरीचें भाषण केलें म्हणून या वर्षी
तूं खरोखर मरशील. १७ त्याप्रमाणें त्याच वर्षी
सातव्या महिन्यांत हनन्या संदेष्टा मेला.

२९ १ मग पकडून नेलेल्या लोकांतील अवशिष्ट
वडील, याजक, संदेष्टे व जे सर्व लोक नबुखद्रे-
स्सरानें पकडून यरुशलेमांतून बाबेलास
नेले होते त्या सर्वांस यिर्मया संदेष्टयानें यरुशलेमाहून

[1] पाठभेद: तूं करिशील.

पत्र पाठविलें; २ यकन्या राजा, राजमाता, खोजे,
यहूदाचे व यरुशलेमाचे सरदार, कारागीर व लोहार
हे यरुशलेमांतून गेल्यावर तें त्यानें पाठविलें;
३ तें शाफानाचा पुत्र एलासा व हिल्कीयाचा पुत्र
गमऱ्या यांच्या हस्तें रवाना केलें; त्यांस यहूदाचा राजा
सिद्कीया यानें बाबेलचा राजा नबुखद्नेस्सर याजकडे
बाबेलास पाठविलें; त्या पत्रांतील मजकूर असा होता;
४ सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, ज्या
सर्वांस मीं यरुशलेमाहून बंदिवान होऊन बाबेलास
जावयास लावलें त्या सर्व बंदिवान झालेल्यांस मी असें
म्हणतों: ५ तुम्ही घरें बांधून त्यांत वस्ती करा; मळे
लावा व त्यांचीं फळें खा; ६ बायका करून पुत्र व
कन्या यांस जन्म द्या, आपल्या पुत्रांस बायका करून
द्या, व आपल्या कन्यांस नवरे करून द्या, म्हणजे त्यांस पुत्र
व कन्या होतील; तुमची तेथें वाढ होऊं द्या, क्षय होऊं
देऊं नका. ७ तुम्हांस पकडून ज्या नगरास मीं
नेलें त्याचें हितचिंतन करा व त्यासाठीं परमेश्वराची प्रार्थना
करा; त्या नगराचें हित तें तुमचें हित. ८ कारण
सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, तुमच्यांत
वागणारे संदेष्टे व तुमचे दैवज्ञ यांनीं तुम्हांस फसवूं
नये; तुम्ही ज्यांस स्वप्नें पाहण्यास लावतां त्या स्वप्न-
द्रष्ट्यांचें ऐकूं नका. ९ कारण ते माझ्या नामानें तुम्हांस
खोटा संदेश देतात; मीं त्यांस पाठविलें नाहीं, असें
परमेश्वर म्हणतो. १० परमेश्वर असें म्हणतो कीं
बाबेलचीं सत्तर वर्षे भरल्यावर मी तुमचा समाचार
घेईन व तुम्हांस या स्थळीं परत आणण्याचें जें माझें
सुवचन आहे तें तुमच्यासंबंधानें पूर्ण करीन. ११ पर-
मेश्वर म्हणतो, तुम्हांविषयीं माझ्या मनांत जे संकल्प
आहेत ते मी जाणतों; ते संकल्प हिताचे आहेत,
अनिष्टाचे नाहींत; ते तुम्हांस तुमच्या भावी सुस्थितीची
आशा देणारे आहेत. १२ तेव्हां तुम्ही माझा धावा
कराल, तुम्ही जाऊन माझी प्रार्थना कराल व मी तुमचें
ऐकेन. १३ तुम्ही मला शरण याल आणि पूर्ण जिवें-
भावें माझ्या शोधास लागाल, तेव्हां मीं तुम्हांस पावेन.
१४ परमेश्वर म्हणतो, मी तुम्हांस पावल्यावर, मी
तुमचा बंदिवास उलटवीन आणि ज्या सर्व लोकांत व
ज्या सर्व स्थळीं मीं तुम्हांस हाकून लाविलें आहे तेथून
तुम्हांस एकत्र करीन, असें परमेश्वर म्हणतो; आणि
ज्या स्थळाहून मीं तुम्हांस पकडून न्यावयास
लाविलें त्या स्थळीं तुम्हांस परत आणीन. १५ तुम्ही
म्हणतां कीं परमेश्वरानें बाबेलांत आम्हांसाठीं
संदेष्टे उत्पन्न केले; १६ पण दाविदाच्या सिंहासना-
वर बसलेल्या राजाविषयीं व या नगरांत राहणारे
सर्व लोक, म्हणजे अर्थात् तुमचे बांधव तुम्हांबरोबर
बंदिवान होऊन गेले नाहींत त्यांच्याविषयीं, सेनाधीश
परमेश्वर असें म्हणतो: १७ पाहा, मी त्यांच्यामध्यें
तरवार, दुष्काळ व मरी पाठवीन; मी त्यांस
वाईट अंजिरांसारखें करीन; ते नासल्यामुळें खाववत
नाहींत. १८ मी तरवार, दुष्काळ व मरी यांनीं त्यांचो
पाठ पुरवीन; सर्व पृथ्वीवरल्या राष्ट्रांना दहशत पोहंचेल
असें मी त्यांचें करीन; आणि जेथें मीं त्यांस हाकून
दिलें आहे त्या सर्व राष्ट्रांत ते शाप, विस्मय, उपहास
आणि निंदा यांचे विषय होतील. १९ परमेश्वर म्हणतो,
माझे सेवक जे संदेष्टे त्यांस माझीं वचनें देऊन मी
मोठ्या निकडीनें त्यांच्याकडे पाठवीत आलों तरी त्यांनीं
तीं ऐकलीं नाहींत; आणि तुम्हीहि तीं ऐकत नाहीं
असें परमेश्वर म्हणतो. २० बंदिवासांतले लोकहो,
ज्या तुम्हांस मीं यरुशलेमाहून बाबेलास पाठविलें तें
तुम्ही सर्व परमेश्वराचें वचन ऐका.

२१ कोलायाचा पुत्र अहाब आणि मासेयाचा पुत्र
सिद्कीया हे माझ्या नामानें तुम्हांस खोटा संदेश
देतात त्यांविषयीं सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव
म्हणतो, पाहा, मी त्यांस बाबेलचा राजा नबुखद्नेस्सर
याच्या हातीं देईन; व तो त्यांस तुमच्या डोळ्यांदेखत
वधील; २२ त्यांच्यावरून बाबेलांत असलेल्या यहूदाच्या
होऊन गेलेल्या सर्व बंदिवान लोकांमध्यें हा शाप प्रचारांत
येईल कीं बाबेलच्या राजानें सिद्कीया व अहाब या
दोघांस अग्नीनें जाळिलें तसें परमेश्वर तुझें करो.
२३ कारण त्यांनीं इस्राएलांत मूर्खपण केलें आहे, त्यांनीं
आपल्या शेजाऱ्यांच्या बायकांबरोबर जारकर्म केलें आहे,

मीं त्यांस आज्ञापिलीं नाहींत अशीं खोटीं वचनें त्यांनीं
माझें नाम घेऊन सांगितलीं; मी तर हें जाणतों व मी
साक्षी आहें असें परमेश्वर म्हणतो.
२४ नेहेलमी शमाया यास तूं असें सांग,
२५ सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, तूं
आपल्याच नांवानें यरुशलेमांत असलेल्या सर्व लोकांस,
मासेयाचा पुत्र सफन्या याजक यास व सर्व याजकांस
पत्रें पाठवून कळविलें कीं, २६ परमेश्वराच्या मंदिरांत
आपण कारभारी व्हावें, आणि जो कोणी वेडा होऊन
आपणाला संदेष्टा म्हणतो त्यास खोड्यांत घालून बेड्या
घालाव्या म्हणून परमेश्वराने यहोयादा याजकाच्या जागीं
स्वतःला याजक केलें आहे. २७ तर यिर्मया अनाथोथ-
कर तुम्हांसमोर आपणास संदेष्टा म्हणवितो त्याला तूं
प्रतिबंध कां केला नाहीं ? २८ त्यानें इकडे आम्हांस
बाबेल एथें एक पत्र पाठविलें, त्याचा आशय हा कीं
बंदिवास दीर्घकाल राहील; तर घरें बांधा, त्यांत वस्ती
करा; मळे लावा व त्यांचीं फळें खा. २९ हें पत्र
सफन्या याजकानें यिर्मया संदेष्टयाला वाचून दाखविलें.
३० तेव्हां परमेश्वराचें वचन यिर्मयाला प्राप्त झालें कीं
३१ सर्व बंदिवासांतल्या लोकांना हें सांगून पाठीव कीं
नेहेलमी शमाया याच्यासंबंधानें परमेश्वर म्हणतो, मीं
शमायाला पाठविलें नसून त्यानें तुम्हांस संदेश दिला व
खोट्या वचनावर भरंवसा ठेवण्यास लाविलें; ३२ म्हणून
परमेश्वर म्हणतो, पाहा, मी नेहेलमी शमाया व त्याचे
वंशज यांस शिक्षा करीन; या लोकांत राहून त्याचें
नांव घ्यावयाला त्याचें कोणी उरणार नाहीं; मी
आपल्या लोकांचें अभीष्ट करणार तें तो पाहणार नाहीं;
कारण तो परमेश्वराविरुद्ध फितुरीचे शब्द बोलला
आहे, असें परमेश्वर म्हणतो.

३० १ परमेश्वराचें वचन यिर्मयाला प्राप्त झालें
तें हें: २ परमेश्वर इस्राएलाचा देव असें
म्हणतो कीं जीं वचनें मीं तुला सांगितलीं तीं
सर्व पुस्तकांत लिहून ठेव. ३ कारण परमेश्वर म्हणतो,
पाहा, असे दिवस येत आहेत कीं माझे लोक इस्राएल
व यहूदा यांचा बंदिवास मी उलटवीन; मीं जो देश
त्यांच्या पूर्वजांस दिला त्यांत त्यांस परत आणीन व ते
त्याचा ताबा घेतील असें परमेश्वर म्हणतो.
४ परमेश्वरानें इस्राएल व यहूदा याविषयीं वचनें
सांगितलीं तीं हीं; ५ परमेश्वर असें म्हणतो, तुम्ही
म्हणतां *आम्हीं थरकांप झालेल्यांचा* शब्द ऐकला आहे,
दहशत आहे, शांति नाहीं. ६ कोणा पुरुषास प्रसववेदना
होत आहेत कीं काय, हें विचारा; पाहा, प्रत्येक पुरुष
प्रसवणाऱ्या स्त्रीप्रमाणें कंबरेला हात देऊन उभा आहे व
प्रत्येकाचें तोंड फिकें पडलें आहे असें माझ्या दृष्टीस
कां पडत आहे ? ७ हाय हाय ! तो महादिन आहे;
त्यासमान दुसरा नाहीं; तो याकोबाचा क्लेशसमय आहे,
तरी त्यांतून त्याचा निभाव होईल. ८ सेनाधीश परमे-
श्वर म्हणतो, त्या दिवशीं असें होईल कीं मी तुझ्या माने-
वरील त्याचें जूं मोडीन, तुझीं बंधनें तोडीन, यापुढें
परके तुझ्या लोकांकडून दास्य करवून घेणार नाहींत;
९ तर परमेश्वर त्यांचा देव याची आणि जो त्यांचा
राजा दावीद मी त्यांच्यासाठीं स्थापीन त्याची ते सेवा
करितील. १० परमेश्वर म्हणतो, हे माझ्या सेवका,
याकोबा, तूं भिऊं नको; हे इस्राएला, कच खाऊं
नको; कारण पाहा, मी दूर देशांतून तुझा उद्धार
करीन, बंदिवासाच्या देशांतून तुझ्या वंशजांचा उद्धार
करीन; याकोब परत येईल, तो विश्राम पावेल व
निर्भय होईल; त्यास कोणी धाक घालणार नाहीं.
११ कारण तुझा उद्धार करण्यास मी तुजबरोबर आहें,
असें परमेश्वर म्हणतो; कारण ज्या राष्ट्रांतून मीं तुझी
पांगापांग केली आहे त्या सर्वांचा मी पुरा नाश करीन,
पण तुझा पुरा नाश करणार नाहीं; तरी मी तुला
योग्य शासन करीन, तुला शिक्षा केल्यावांचून सोड-
णार नाहीं.
१२ कारण परमेश्वर म्हणतो, तुझी जखम असाध्य
आहे, तुझा घाय भारी आहे. १३ तुझी दाद लावणारा
कोणी नाहीं; तुझ्या घायास उपचार नाहीं; मलमपट्टी
नाहीं. १४ तुझे सर्व सखे तुला विसरले आहेत; ते
तुला विचारीत नाहींत; तुझ्या घोर दुष्कर्मांमुळें, तुझीं

पातकें फार झाल्यामुळें, तुला शत्रूप्रमाणें जखम करून,
क्रूर जनांप्रमाणें शिक्षा करून, मीं तुला घायाळ केलें
आहे. १५ तूं आपल्या घायामुळें कां ओरडतेस ?
तुझी जखम असाध्य आहे; तुझ्या घोर दुष्कर्मांमुळें
तुझीं पातकें फार झालीं आहेत; म्हणून मीं तुला हें सर्व
केलें आहे. १६ तुला ग्रासून टाकणाऱ्या सर्वांस ग्रासून
टाकण्यांत येईल; आणि तुझे सर्व वैरी बंदिवान होऊन
जातील; तुझें हरण करणाऱ्यांचें हरण होईल, तुला लुटणाऱ्या
सर्वांस मी लुटवीन. १७ मी तर तुला आरोग्य देईन
व तुझ्या जखमा बऱ्या करीन, असें परमेश्वर म्हणतो;
कारण त्यांनीं म्हटलें आहे कीं हिला टाकून दिलें आहे;
ही सीयोन ! हिला कोणी विचारीत नाहीं. १८ परमे-
श्वर म्हणतो, मी याकोबाच्या डेऱ्यांचा बंदिवास उलट-
वीन, मी त्याच्या वसतिस्थानांवर दया करीन; नगर पुनः
त्याच्याच टेकडीवर बांधितील, आणि राजवाड्यांतून
पूर्ववत् वस्ती होईल. १९ त्यांमधून उपकारस्मरणाचा व
आनंदोत्सव करणाऱ्यांचा शब्द उठेल; मी त्यांची संख्या
वाढवीन, ती अल्प होणार नाहीं; मी त्यांचें गौरव
करीन म्हणजे ते क्षुद्र असावयाचे नाहींत. २० त्यांच्या
मुलांची स्थिति पूर्ववत् होईल, त्यांची मंडळी माझ्या-
समोर स्थिर राहील, त्यांजवर जुलूम करणाऱ्यांस मी
शासन करीन. २१ त्यांचा पुढारी त्यांच्यांतलाच होईल,
त्यांचा नियंता त्यांच्यांतूनच निघेल; मी त्याला जवळ
आणीन म्हणजे तो माझ्यासन्निध येईल; कारण
माझ्यासन्निध येण्याचा कोणाच्या मनाला हिय्या झाला
आहे, असें परमेश्वर म्हणतो. २२ तुम्ही माझे लोक
व्हाल व मी तुमचा देव होईन.

२३ पाहा, परमेश्वरापासून क्रोधरूप तुफान सुटलें
आहे; धुव्वा उडविणारी वावटळ दुष्टांच्या डोक्यावर
आदळेल. २४ परमेश्वर आपलें कार्य संपवीपर्यंत व
आपला मनोदय पूर्ण करीपर्यंत त्याचा संतप्त क्रोध
फिरावयाचा नाहीं; हें पुढील काळीं तुम्हांस समजेल.

३१ १ परमेश्वर म्हणतो, त्या काळीं मी इस्रा-
एलाच्या सर्व वंशांचा देव होईन व ते माझे
लोक होतील. २ परमेश्वर म्हणतो, तरवारी-
पासून निभावलेल्या लोकांस रानांत अनुग्रह मिळाला;
या इस्राएलास विश्रांति देण्यास मला जाणें आहे.
३ परमेश्वरानें दुरून येऊन मला दर्शन दिलें; तो
म्हणाला, मी सार्वकालिक प्रेमवृत्तीनें तुजवर प्रेम करीत
आलों म्हणून मीं तुला वात्सल्यानें जवळ केलें आहे.
४ हे इस्राएलाच्या कुमारी, मी तुझी पुनर्घटना करीन
आणि तुझी घटना होईल; तूं पुनः आपल्या खंजिऱ्यांनीं
भूषित होशील व उत्सव करणाऱ्यांबरोबर नृत्य करि-
शील. ५ शोमरोनाच्या डोंगरांवर तूं पुनः द्राक्षमळे
लाविशील; लावणारे लावितील व त्यांचीं फळें त्यांला
लाभतील. ६ कारण असा दिवस येत आहे कीं त्यांत
एफ्राईम डोंगरांवर जागल्ये ओरडून सांगतील, अहो
उठा, आपण सीयोनास आपला देव परमेश्वर याच्याकडे
जाऊं. ७ कारण परमेश्वर म्हणतो, याकोबाविषयीं
आनंदाचा गजर करा; राष्ट्रांच्या अग्रेसराचा जयजयकार
करा; घोषणा करा, स्तवन करा व म्हणा, हे परमे-
श्वरा, तुझ्या लोकांचा, इस्राएलाच्या अवशेषाचा
उद्धार कर. ८ पाहा, मी त्यांस उत्तरेच्या देशांतून
आणीन, त्यांस पृथ्वीच्या दिगंतांहून जमा करीन;
त्यांच्यामध्यें अंधळे व पांगळे, गर्भवती व प्रसूतिवेदना
लागलेल्या असणार; मोठ्या समुदायानें ते इकडे परत
येतील. ९ ते अश्रुपात करीत येतील; ते विनंति
करीत असतां मी त्यांस नेईन; ते ठोकर खाणार
नाहींत अशा सरळ मार्गानें मी त्यांस पाण्याच्या प्रवाहां-
कडे आणीन; कारण मी इस्राएलास पिता झालों
आहें व एफ्राईम माझा प्रथम जन्मलेला आहे.

१० अहो राष्ट्रांनो, परमेश्वराचें वचन ऐका;
दूरच्या द्वीपांत हें प्रसिद्ध करा व म्हणा, ज्यानें इस्रा-
एलास विखरलें तो त्यांस जमा करील; मेंढपाळ
आपल्या कळपाची निगा करितो तशी तो त्यांची निगा
करील. ११ कारण परमेश्वरानें इस्राएलाचा उद्धार
केला आहे व त्याच्याहून जो बलवान् त्याच्या हातून
त्याला मुक्त केलें आहे. १२ ते येऊन सीयोनाच्या
माथ्यावर आनंदानें गातील; परमेश्वराचीं उपयुक्त
वरदानें म्हणजे धान्य, नवा द्राक्षारस, ताजें तेल व

गुरेंमेंढरांचे वत्स यांकडे लोटतील; त्यांचा जीव भरपूर
पाणी दिलेल्या बागेप्रमाणें होईल; यापुढें ते म्लान
होणार नाहींत. १३ त्या समयीं कुमारी आनंदानें
नृत्य करितील; वृद्ध व तरुण एकत्र आनंद करितील; मी
त्यांचा शोक पालटून तेथें आनंद करीन, मी त्यांचें सांत्वन
करीन, त्यांच्या दुःखानंतर त्यांनीं आनंद करावा असें
मी करीन; १४ आणि मी त्यांच्या याजकांचा जीव
मिष्टान्नांनीं तृप्त करीन; माझे लोक माझ्या उत्तम
वरदानांनीं तृप्त होतील, असें परमेश्वर म्हणतो.

१५ परमेश्वर असें म्हणतो, रामांत शोक व आक्रंद
यांचा शब्द ऐकूं येत आहे; राहेल आपल्या मुला-
साठीं रडत आहे; आपल्या मुलांमुळें ती सांत्वन
पावत नाहीं, कारण तीं नाहींत. १६ परमेश्वर असें
म्हणतो, तूं आपला शब्द रडण्यापासून आणि आपले
डोळे अश्रुपातापासून आवर; कारण तुझ्या श्रमाचें फळ
तुला मिळेल; ते शत्रूच्या देशांतून परत येतील असें
परमेश्वर म्हणतो. १७ परमेश्वर म्हणतो, तुला भावी
सुस्थितीची आशा आहे; तुझीं मुलें आपल्या सीमेच्या
आंत परत येतील. १८ मीं एफ्राइमास खरोखर असा
विलाप करितां ऐकलें आहे कीं, बेबंद वासरासारखा जो
मी त्या मला तूं शिक्षा केली आणि मला शिक्षा झाली; तूं
मला वळीव म्हणजे मी वळेन; कारण हे परमेश्वरा, तूं
माझा देव आहेस. १९ मीं वळल्यावर पश्चात्ताप केला;
मला बोधप्राप्ति घडल्यावर मी ऊर बडवूं लागलों;
माझ्या तारुण्यांतील अपकीर्तीच्या भारामुळें मी लज्जित
व फजीत झालों आहें. २० एफ्राईम माझा प्रिय पुत्र
आहे ना? तो माझा लाडका मुलगा आहे ना? मी
वारंवार त्याच्याविरुद्ध बोलतों तरी मी त्याची आठवण
करीतच असतों; म्हणून माझीं आंतडीं त्याच्यासाठीं
कळवळतात; मी त्याच्यावर दया करीनच करीन असें
परमेश्वर म्हणतो.

२१ वाटेवर आपल्यासाठीं खुणा कर; खुणेचे खांब
उभे कर; ज्या मार्गानें तूं गेलीस त्या सडकेवर आपलें
चित्त ठेव; हे इस्राएलाच्या कुमारी, परत ये, तुझ्या
या नगरांस परत ये. २२ हे मला सोडून जाणाऱ्या
कन्ये, तूं कोठवर इकडेतिकडे भटकशील? परमेश्वरानें
तर पृथ्वीवर अजब प्रकार केला आहे; स्त्री पुरुषाच्या
मागें लागेल.

२३ सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव असें म्हणतो
कीं मी यहूदा देशाचा व त्यांतील नगरांचा बंदिवास
उलटवीन तेव्हां या देशांत लोक पुनः हें आशीर्वचन
म्हणतील: हे धार्मिकतेच्या निवासा, पावित्र्याच्या गिरी,
परमेश्वर तुझें कल्याण करो! २४ यहूदा व त्यांतील
सर्व नगरें यांतले लोक शेतकरी व मेंढरांचे कळप
घेऊन फिरणारे असे त्यांत एकत्र राहतील. २५ कारण
श्रांत जिवास मीं तृप्त केलें आहे, प्रत्येक म्लान हृदयास
पुनः भरून काढिलें आहे. २६ यानंतर मी जागा होऊन
पाहतों तों ही माझी निद्रा मला गोड अशी भासली.
२७ परमेश्वर म्हणतो, पाहा, असे दिवस येत आहेत कीं
त्यांत मी इस्राएलाच्या घराण्यांत व यहूदाच्या घराण्यांत
मनुष्यबीज व पशुबीज पेरीन; २८ आणि असें होईल कीं
उपटण्याच्या व मोडून टाकण्याच्या, पाडून टाकण्याच्या व
नाश करण्याच्या आणि पीडा करण्याच्या कामीं मीं जशी
त्यांवर नजर ठेविली तशी बांधून काढण्याच्या व लागवड
करण्याच्या कामीं मी त्यांजवर नजर ठेवीन असें परमेश्वर
म्हणतो. २९ बापांनीं आंबट द्राक्षें खाल्लीं व त्यानें मुलांचे
दांत आंबले, असें त्या काळीं लोक म्हणणार
नाहींत. ३० तर प्रत्येक मनुष्य आपल्याच दुष्कर्मांमुळें
मरेल; जो कोणी आंबट द्राक्षें खाईल त्याचेच दांत
आंबतील.

३१ परमेश्वर म्हणतो, पाहा, असे दिवस येत आहेत
कीं त्यांत इस्राएलाचें घराणें व यहूदाचें घराणें यांच्या-
बरोबर मी नवा करार करीन; ३२ परमेश्वर म्हणतो,
मीं त्यांच्या पूर्वजांचा हात धरून त्यांस मिसर देशांतून
बाहेर आणिलें, तेव्हांच्या कराराप्रमाणें हा करार व्हाव-
याचा नाहीं; मी त्यांजबरोबर विवाह केला तरी तो माझा
करार त्यांनीं मोडिला. ३३ तर परमेश्वर म्हणतो, त्या
दिवसांनंतर इस्राएलाच्या घराण्याबरोबर जो करार मी
करीन तो हा: मी आपलें धर्मशास्त्र त्यांच्या अंतर्यामीं

१ मुळांत : मांडी

ठेवीन; मी तें त्यांच्या हृदयपटावर लिहीन; मी त्यांचा
देव होईन व ते माझे लोक होतील. ३४ परमेश्वर
म्हणतो, यापुढें कोणी आपल्या शेजाऱ्यास, कोणी
आपल्या बंधूस, परमेश्वराला ओळखा, असा बोध कर-
णार नाहींत; कारण लहानापासून थोरापर्यंत ते सर्व
मला ओळखतील; मी त्यांच्या अधर्माची क्षमा करीन,
त्यांचें पाप मी यापुढें स्मरणार नाहीं. ३५ जो परमे-
श्वर दिवसा प्रकाशासाठीं सूर्य देतो व रात्रीं प्रकाशासाठीं
चंद्र व नक्षत्रें यांचे नियम लावून देतो, जो समुद्रास
खवळवितो म्हणजे त्याच्या लाटा गर्जतात, ज्याचें नाम
सेनाधीश परमेश्वर आहे, तो असें म्हणतो कीं ३६ यदा-
कदाचित् मजसमोरून हे नियम ढळतील तर इस्रा-
एलचा वंश माझ्यासमक्ष राष्ट्र या पदापासून अक्षय
ढळेल. ३७ परमेश्वर म्हणतो, वर आकाशाचें मापन
करणें व खालीं पृथ्वीच्या पायांचा थांग लावणें हें
साध्य असलें तरच इस्राएलाच्या वंशानें जें कांहीं केलें
त्या सर्वांमुळें मी त्या सगळ्या वंशांचा त्याग करीन, असें
परमेश्वर म्हणतो. ३८ परमेश्वर म्हणतो, पाहा, असे
दिवस येत आहेत कीं त्यांत मज परमेश्वरासाठीं हाना-
नेलाच्या बुरुजापासून कोपऱ्याच्या वेशीपर्यंत नगर
बांधून काढितील; ३९ आणि मापनसूत्र पुनः एकदां
थेट गारेबाच्या टेकडीवर लागेल व तेथून गवाथाकडे
वळसा घेईल. ४० प्रेतांचें व राखेचें सर्व खोरें आणि
किद्रोन ओहोळापर्यंत, पूर्वेकडील घोडवेशीच्या कोपऱ्या-
पर्यंत सर्व शेतें परमेश्वराला पवित्र होतील; पुनः
कधींहि तीं उपटण्यांत येणार नाहींत किंवा मोडून
टाकणार नाहींत.

३२ १ यहूदाचा राजा सिद्कीया याच्या कार-
कीर्दीच्या दहाव्या वर्षी, म्हणजे नबुखद्नेस्सराच्या
कारकीर्दीच्या अठराव्या वर्षी, परमेश्वराचें वचन
यिर्मयाला प्राप्त झालें. २ त्या समयीं बाबेलच्या
राजाच्या सैन्यानें यरुशलेमास वेढा दिला होता आणि
यिर्मया संदेष्टा यहूदाच्या राजगृहांतील पहारेकऱ्यांच्या
चौकांत बंदीमध्यें होता. ३ यहूदाचा राजा सिद्कीया
यानें त्याला अटकेंत टाकिलें तेव्हां तो त्याला म्हणाला
होता कीं तूं असा संदेश कां देतोस कीं परमेश्वर
म्हणतो, पाहा, मी हें नगर बाबेलच्या राजाच्या हातीं
देतों, व तो तें हस्तगत करील; ४ आणि यहूदाचा राजा
सिद्कीया खास्द्यांच्या हातून सुटणार नाहीं, तर बाबेल-
च्या राजाच्या हातीं खात्रीनें दिला जाईल; तो त्याजशीं
समक्ष बोलेल, आपल्या डोळ्यांनीं त्याला पाहील; ५ तो
सिद्कीयाला बाबेलास नेईल व मी त्याचा समाचार घेईन
तोंवर तो तेथें राहील असें परमेश्वर म्हणतो; तुम्ही
खास्द्यांशीं लढलां तरी तुमची सरशी होणार नाहीं.

६ यिर्मया म्हणाला, परमेश्वराचें वचन मला प्राप्त
झालें कीं ७ पाहा, तुझा चुलता शल्लूम याचा पुत्र
हानामेल तुजकडे येऊन म्हणेल, अनाथोथ येथलें माझें
शेत विकत घे; कारण तें सोडवून घेण्याचा हक्क तुझा
आहे. ८ तेव्हां परमेश्वराच्या वचनाप्रमाणें माझा
चुलतभाऊ हानामेल मजकडे पहारेकऱ्यांच्या चौकांत
आला; तो मला म्हणाला, बन्यामिनाच्या प्रांतांतील
अनाथोथ येथलें माझें शेत विकत घे; कारण तें वतन
करून घेण्याचा व सोडविण्याचा हक्क तुझा आहे; तूं तें
आपल्यासाठीं विकत घे. तेव्हां मी समजलों कीं हें
परमेश्वराकडचें वचन आहे. ९ मग मीं अनाथोथांतलें
तें शेत माझा चुलतभाऊ हानामेल याजपासून विकत
घेतलें व त्याला त्याचें मोल सतरा शेकेल रुपें तोलून
दिलें. १० मीं खरेदीखतावर सही केली, त्यावर शिक्का
मारिला व साक्षी बोलावून त्यास पैसा तागडीनें तोलून
दिला. ११ तेव्हां शर्ती नमूद केलेल्या खरेदीखताची एक
मोहोरबंद व एक उघडी अशा नकला मीं घेतल्या;
१२ आणि माझा चुलतभाऊ हानामेल याच्यासमक्ष व
ज्यांनीं खरेदीखतावर साक्षी घातल्या होत्या त्यांच्या-
समक्ष आणि पहारेकऱ्यांच्या चौकांत जे यहूदी बसले
होते त्या सर्वांच्यासमक्ष तें खरेदीखत बारूख बिन
नरीया बिन महसेया याच्या स्वाधीन केलें. १३ मीं
त्यांच्यासमक्ष बारुखास बजावून सांगितलें कीं
१४ सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो,
मोहरबंद व उघडें अशीं हीं दोन्हीं खरेदीखतें घेऊन

एका मातीच्या पात्रांत घालून ठेव म्हणजे तीं बरेच दिवस
राहतील. १५ कारण सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा
देव म्हणतो, घरेंदारें, शेतें, द्राक्षांचे मळे यांची या
देशांत पुनः खरेदी चालू होईल.
१६ मीं तें खरेदीखत नरीयाचा पुत्र बारूख यास
दिल्यावर परमेश्वराची प्रार्थना केली कीं १७ अहा
प्रभू परमेश्वरा ! पाहा, तूं आपल्या महासामर्थ्यानें व
आपल्या उभारलेल्या बाहूनें आकाश व पृथ्वी उत्पन्न
केली; तुला अवघड असें कांहीं नाहीं; १८ तूं हजारोंवर
दया करितोस; बापांच्या अन्यायाचें प्रतिफल त्यांच्या-
मागें त्यांच्या मुलांच्या पदरीं घालितोस; थोर पराक्रमी
देव, सेनाधीश परमेश्वर, हें तुझें नाम आहे; १९ तूं
चातुर्यानें थोर व कृतीनें पराक्रमी असून प्रत्येकास
ज्याच्या त्याच्या आचरणाप्रमाणें व कर्मफलाप्रमाणें द्यावें
म्हणून मानवजातीचे अखिल मार्ग तुझ्या दृष्टीला खुले
आहेत; २० तूं मिसर देशांत चिन्हें व अद्भुत कृत्यें
केलीं, आजवर इस्राएलांत व इतर लोकांत तीं करीत
आला आहेस आणि आज आहे तसें तूं आपलें नाम
केलें आहे; २१ तूं चिन्हें व अद्भुत कृत्यें दाखवून
समर्थ हातानें व बाहु उभारून मोठी दहशत घालवून
आपले लोक इस्राएल यांस मिसर, देशांतून बाहेर
आणिलें; २२ आणि तूं त्यांच्या पूर्वजांस प्रतिज्ञापूर्वक
देऊं केलेला हा देश, ज्यांतून दुधामधाचे प्रवाह
वाहत आहेत असा हा देश त्यांस दिला; २३ त्यांनीं
येऊन याचा ताबा घेतला, परंतु त्यांनीं तुझी वाणी
ऐकली नाहीं व तुझ्या धर्मशास्त्राप्रमाणें ते चालले
नाहींत; तूं त्यांस आज्ञापिलें त्याप्रमाणें त्यांनीं मुळींच
केलें नाहीं, म्हणून तूं त्यांजवर हें सर्व अरिष्ट आणिलें.
२४ पाहा, हें नगर घेण्यासाठीं त्याला वेढा घालणाऱ्यांचे
मोर्चे लागले आहेत; तरवार, दुष्काळ व मरी यांमुळें
यांशीं युद्ध करणाऱ्या खास्द्यांच्या हातीं हें लागलें
आहे; तूं बोललास तसें घडलें आहे. पाहा, हें तुला
दिसत आहे. २५ तरी, हे प्रभू परमेश्वरा, हें नगर
खास्द्यांच्या हातीं लागत असतां तूं मला म्हणालास, पैसा
देऊन हें शेत आपल्यासाठीं विकत घे व साक्षी बोलाव.

२६ मग परमेश्वराचें वचन यिर्मयाला प्राप्त झालें
कीं २७ पाहा, मी परमेश्वर सर्व मानवजातीचा देव
आहें; मला अवघड असें कांहीं आहे काय ?
२८ ह्याकरितां परमेश्वर असें म्हणतो, पाहा, मी हें
नगर खास्द्यांच्या हातीं देईन, तें बाबेलचा राजा नबु-
खद्रेस्सर याच्या हातीं देईन, व तो तें हस्तगत करील;
२९ आणि या नगराबरोबर युद्ध करणारे खास्दी येऊन
या नगरास आग लावून जाळून टाकितील, आणि ज्या
घरांच्या धाब्यांवर त्यांनीं बालमूर्तीस धूप जाळिला व
मला चिडविण्यासाठीं अन्य देवांस पेयार्पणें वाहिलीं तीं
घरेंहि ते जाळून टाकितील. ३० कारण इस्राएलाचे
वंशज व यहूदाचे वंशज यांनीं तरुणपणापासून माझ्या
दृष्टीनें अगदीं वाईट तें केलें; इस्राएलाचे वंशज आपल्या
हातच्या कर्मांनीं केवळ मला संतापवीत आहेत, असें
परमेश्वर म्हणतो. ३१ हें नगर त्यांनीं बांधिलें तेव्हां-
पासून आजवर माझा क्रोध व संताप चेतविण्यास
हें कारण झालें, एथवर कीं तें मीं आपल्या दृष्टीसमोरून
काढून टाकावें. ३२ इस्राएलाचे वंशज व यहूदाचे
वंशज म्हणजे ते, त्यांचे राजे, त्यांचे सरदार, त्यांचे
याजक व त्यांचे संदेष्टे, यहूदाचे लोक व यरुशलेमनिवासी
यांनीं मला चिडवावें म्हणून जीं सर्व दुष्कर्में केलीं
त्यामुळें मी असें करीन. ३३ त्यांनीं मजकडे तोंड नव्हे
तर पाठ फिरविली; मीं त्यांस बोध केला, मोठ्या
निकडीनें मी त्यांस शिकवीत गेलों तरी ते बोधास कान
देईनात. ३४ तर ज्या मंदिरास माझें नाम दिलें आहे
तें भ्रष्ट करण्यासाठीं त्यांत त्यांनीं आपल्या अमंगळ वस्तु
स्थापिल्या. ३५ यहूदाला पापास प्रवृत्त करण्यासाठीं
मोलखमूर्तीस आपले पुत्र व कन्या होम करून अर्पाव्या
म्हणून बेन-हिन्नोमाच्या खोऱ्यांत त्यांनीं बालमूर्तीचीं उच्च
स्थानें बांधिलीं; हें मीं त्यांस आज्ञापिलें नव्हतें; ते असलें
घोर कृत्य करतील हें माझ्या ध्यानींमनींहि नव्हतें.
३६ तरी आतां ज्या नगराविषयीं तुम्ही म्हणतां
कीं तें तरवार, दुष्काळ व मरी यामुळें बाबेलच्या
राजाच्या हातीं जावयाचें आहे त्याविषयीं परमेश्वर
इस्राएलाचा देव असें म्हणतो: ३७ पाहा, मीं आपल्या

क्रोधानें, संतापानें व महारोषानें त्यांस ज्या ज्या देशांत
हाकून दिलें आहे त्यांतून त्यांस एकत्र करीन; मी या
स्थलीं त्यांस परत आणीन व सुरक्षित वसवीन;
३८ ते माझे लोक होतील व मी त्यांचा देव होईन;
३९ त्यांचें व त्यांच्यानंतर त्यांच्या वंशजांचें हित व्हावें
म्हणून त्यांनीं सदा माझें भय बाळगावें यासाठीं मी त्यांस
एकच हृदय व एकच मार्ग देईन; ४० आणि मी
त्यांजशीं सर्वकाळचा करार करीन; तो असा कीं मी
त्यांचें हित करण्यापासून माघार घेणार नाहीं; मी
आपलें भय त्यांच्या मनांत उत्पन्न करीन, म्हणजे ते
मजपासून माघार घेणार नाहींत. ४१ मी त्यांजविषयीं
आनंद पावून त्यांचें कल्याण करीन व मी मनापासून
व जिवाभावानें त्यांची या देशांत खरोखर लागवड करीन.
४२ कारण परमेश्वर म्हणतो, ज्या प्रकारें मीं या लोकां-
वर हें सर्व मोठें अरिष्ट आणिलें आहे त्याच प्रकारें
त्यांच्या हितसंबंधाचें जें मी बोलतों तें सर्व त्यांस प्राप्त
करून देईन. ४३ ज्या ह्या देशाविषयीं तुम्ही म्हणतां
कीं तो ओसाड आहे, त्यांत मनुष्य व पशु यांचा माग-
मूस नाहीं, तो खास्द्यांच्या हातीं गेला आहे, त्या ह्या
देशांत शेतांची खरेदी होऊं लागेल. ४४ बन्यामीन
प्रांतांत, यरुशलेमाच्या लगत्यास, यहूदाच्या नगरांत,
डोंगराळ प्रदेशांतील नगरांत, मैदानांतल्या नगरांत व
दक्षिणेकडल्या नगरांत लोक पैसा देऊन शेतें घेतील,
त्यांचीं खरेदीखतें करितील, त्यांवर शिक्का मारितील व
साक्षीदार घेतील; कारण मी त्यांचा बंदिवास उलटवीन
असें परमेश्वर म्हणतो.

३३ १ यिर्मया पहारेकऱ्यांच्या चौकांत अजून
बंदींत असतां परमेश्वराचें वचन त्याला दुसऱ्यानें
प्राप्त झालें कीं २ हें करणारा परमेश्वर, हें
घडवून स्थापणारा परमेश्वर, परमेश्वर हें नाम धारण
करणारा म्हणतो कीं, ३ मला हाक मार म्हणजे मी
तुला उत्तर देईन व तुला ठाऊक नाहींत अशा मोठ्या व
गहन गोष्टी तुला सांगेन. ४ या शहरचीं घरें व यहूदाच्या
राजांचीं घरें मोर्चे व तरवार यांच्या निवारणार्थ
मोडून टाकिलीं आहेत, त्यांविषयीं परमेश्वर इस्रा-
एलाचा देव म्हणतो, ५ ज्यांस मीं आपल्या क्रोधानें व
संतापानें वधिलें व ज्यांच्या सगळ्या दुष्टतेमुळें मीं या
नगरापासून आपलें मुख लपविलें त्यांनीं खास्द्यांबरोबर
युद्ध करितांना हीं घरें त्यांच्या प्रेतांनीं भरून टाकिलीं.
६ तर पाहा, मी या नगरास आरोग्याचे उपचार करीन,
त्या लोकांस बरें करीन, आणि शांति व सत्य यांचें वैपुल्य
त्यांच्या ठायीं प्रकट करीन. ७ मी यहूदाचा बंदिवास
व इस्राएलाचा बंदिवास उलटवीन व त्यांस पूर्ववत्
स्थापीन. ८ त्यांनीं जें दुष्कर्म करून मजविरुद्ध पाप
केलें त्या सर्वांचें मी क्षालन करीन; त्यांनीं जीं दुष्कर्में
करून मजविरुद्ध पाप व अपराध केला त्या सर्वांची मी
क्षमा करीन; ९ आणि ह्या नगराचें नांव पृथ्वीवरल्या सर्व
राष्ट्रांसमोर माझ्या आनंदास, स्तुतीस व सन्मानास कारण
होईल; त्यांचें मी जें कल्याण करीन त्याविषयीं तीं
ऐकतील; आणि मी त्यांस हित व शांति प्राप्त करून
देईन; ह्या सर्वांमुळें तीं राष्ट्रें भयभीत होतील व थरथर
कांपतील. १० परमेश्वर म्हणतो, या स्थलाविषयीं
तुम्ही म्हणतां कीं हें ओसाड आहे, यांत मनुष्यें
व पशु यांचा मागमूस नाहीं; यहूदाचीं नगरें व
यरुशलेमाचे रस्ते उद्ध्वस्त झाले आहेत, त्यांत
मनुष्यें, रहिवासी व पशु यांचें नांव नाहीं, ११ त्यांत
आनंद व हर्ष यांचा ध्वनि होईल, नवऱ्याची व नवरीची
वाणी ऐकूं येईल; सेनाधीश परमेश्वराची स्तुति असो,
कारण परमेश्वर चांगला आहे, त्याची दया सर्वकाळची
आहे, असें म्हणून जे परमेश्वराच्या मंदिरांत स्तुत्यर्पणें
आणितात त्यांचा शब्द पुनः ऐकूं येईल. कारण मी
देशाचा बंदिवास उलटवून आरंभीं होतें तसें सर्व
कांहीं करीन, असें परमेश्वर म्हणतो. १२ सेनाधीश
परमेश्वर म्हणतो, जें हें स्थळ ओसाड आहे व ज्यांत
मनुष्य व पशु यांचा मागमूस नाहीं त्याच्या सर्व
नगरांत मेंढपाळ आपले कळप बसविण्यासाठीं पुनः
वाडे करितील. १३ डोंगरवटींतल्या शहरांत, मैदानां-
तल्या शहरांत, दक्षिणेंतल्या शहरांत, बन्यामिनाच्या
प्रांतांत, यरुशलेमाच्या लगत्यास आणि यहूदाच्या
नगरांत मोजदाद करणाऱ्याच्या हातीं पुनः कळप

जातील, असें परमेश्वर म्हणतो.
१४ परमेश्वर म्हणतो, पाहा, इस्राएलाच्या घराण्या-
विषयीं व यहूदाच्या घराण्याविषयीं जें हितकर वचन मीं
सांगितलें तें पूर्ण करण्याचे दिवस येत आहेत. १५ त्या
दिवसांत व त्या समयीं दाविदाला धार्मिकतेचा एक
अंकुर फुटे असें मी करीन, तो देशांत न्याय व
धार्मिकता चालवील. १६ त्या दिवसांत यहूदाचा उद्धार
होईल व यरुशलेम सुरक्षित वसेल; आणि परमेश्वर
आमची धार्मिकता हें नांव त्याला देतील. १७ कारण
परमेश्वर म्हणतो, इस्राएलाच्या घराण्याच्या सिंहासनावर
बसणाऱ्याची उणीव दाविदाला पडावयाची नाहीं;
१८ तसेंच मजसमोर होमार्पण करणारा, अन्नार्पणाचा
होम करणारा व नित्य यज्ञ करणारा यांची लेवीय
याजकांस उणीव पडणार नाहीं. १९ परमेश्वराचें वचन
यिर्मयाला प्राप्त झालें कीं, २० परमेश्वर म्हणतो, दिवस
व रात्र यांविषयीं जो माझा करार तो तुमच्यानें मोड-
वेल, म्हणजे दिवसाचा व रात्रीचा जो नित्यक्रम तो
नाहींसा होईल; २१ तरच माझा सेवक दावीद याजशीं
केलेला माझा करार मोडून त्यास आपल्या सिंहासनावर
बसण्यास कोणी वंशज असावयाचा नाहीं, आणि माझे
सेवक लेवीय याजक यांजशीं केलेला करारहि मोडेल.
२२ आकाशसैन्याची गणती करवत नाहीं, समुद्राच्या
वाळूचें मापन करवत नाहीं, त्याप्रमाणें माझा सेवक
दावीद याची संतति व सेवा करणारे लेवी यांस मी
बहुगुणित करीन. २३ परमेश्वराचें वचन यिर्मयाला प्राप्त
झालें तें असें: २४ हे लोक म्हणतात कीं, परमेश्वरानें
निवडलेल्या दोन्ही घराण्यांचा त्याग केला नाहीं काय?
या त्यांच्या म्हणण्याकडे तूं लक्ष दिलें ना? ते माझ्या
लोकांचा असा धिक्कार करितात कीं ते त्यांना राष्ट्र समजत
नाहींत. २५ परमेश्वर असें म्हणतो, दिवस व रात्र
यांविषयींचा माझा करार अचल नसला, आकाश व
पृथ्वी यांचे नियम मीं लावून दिले नसले, २६ तरच
याकोब व माझा सेवक दावीद यांच्या संततीचा मी त्याग
करीन आणि दाविदाच्या संततीपैकीं कोणी अब्राहाम,
इसहाक व याकोब यांच्या संततीवर सत्ता चालविण्यास
ठेवणार नाहीं; मी तर त्यांचा बंदिवास उलटवीन व
त्यांजवर दया करीन.

३४

१ बाबेलचा राजा नबुखद्नेस्सर व त्याचें सर्व
सैन्य, त्याच्या सत्तेखालीं असलेलीं जगांतलीं सर्व
राज्यें व सर्व लोक यांनीं यरुशलेमाबरोबर व
त्याच्या लगत्याच्या सर्व नगरांबरोबर युद्ध चालविलें,
तेव्हां यिर्मयास परमेश्वराचें वचन प्राप्त झालें तें असें:
२ परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, जा, यहूदाचा राजा
सिद्कीया याला सांग कीं परमेश्वर म्हणतो, पाहा, मी
हें नगर बाबेलच्या राजाच्या हातीं देईन व तो तें अग्नीनें
जाळून टाकील; ३ तूं त्याच्या हातून सुटणार नाहींस, तर
तुला पकडून त्याच्या हातीं निश्चयें देतील; तूं आपल्या
डोळ्यांनीं बाबेलच्या राजाला पाहशील व तो तुजबरोबर
समक्ष बोलेल; तूं बाबेलास जाणार. ४ तथापि हे सिद्-
कीया, यहूदाच्या राजा, परमेश्वराचें वचन ऐक; परमे-
श्वर तुझ्याविषयीं असें म्हणतो कीं तूं तरवारीनें मरणार
नाहींस, ५ तर स्वस्थपणें मरशील; तुझ्या पूर्वीचे राजे
तुझे पूर्वज यांच्याकरितां धूप वगैरे जाळीत तसें तुझ्या-
करितां जाळितील, व हायरे, माझ्या स्वामी! असें
बोलून तुजकरितां शोक करितील; कारण हें वचन मी
बोललों आहें असें परमेश्वर म्हणतो. ६ तेव्हां यिर्मया
संदेष्ट्यानें हीं सर्व वचनें यहूदाचा राजा सिद्कीया याला
यरुशलेमांत सांगितलीं. ७ त्या समयीं बाबेलचें सैन्य
यरुशलेमावर आणि यहूदाचीं उरलेलीं नगरें म्हणजे
लाखीश व अजेका यांवर चढाई करून युद्ध करीत होतें;
यहूदाचीं तटबंदी केलेलीं नगरें एवढींच उरलीं होतीं.
८ सिद्कीया राजानें त्या वेळीं यरुशलेमांत
असलेल्या सर्व लोकांबरोबर बंधमुक्त करण्याचा करार
केल्यावर परमेश्वराकडून यिर्मयास वचन प्राप्त झालें तें
हें: ९ ज्या कोणाचा दास अगर दासी इब्री असेल त्यानें
त्याची सुटका करावी; कोणीं आपल्या यहूदी बांधवां-
कडून दास्य करवून घेऊं नये; १० तेव्हां आम्ही
आपल्या सर्व दासांची व दासींची सुटका करूं व
यापुढें त्यांस दास्य करावयास लावणार नाहीं असा

करार ज्या सर्व सरदारांनीं व सर्व लोकांनीं केला
होता ते त्यांस मान्य झाले; त्यांनीं मान्य होऊन दासांस
मुक्त केलें; ११ पण मागाहून ते बदलले, व ज्या दासांस
व दासींस त्यांनीं मुक्त केलें होतें त्यांस त्यांनीं परत
यावयास लाविलें व आपले दास व दासी होण्यासाठीं
त्यांस पुनः ताबेदार केलें. १२ यास्तव परमेश्वराकडून
यिर्मयास परमेश्वराचें हें वचन प्राप्त झालें कीं १३ पर-
मेश्वर इस्राएलाचा देव म्हणतो, तुमचे पूर्वज मिसर
देशांतून, दास्यगृहांतून मीं बाहेर काढिले तेव्हां मीं
त्यांच्याबरोबर करार केला कीं १४ कोणी जातीनें इब्री
असून त्यास तुला विकिलें असलें तर सात वर्षांच्या शेवटीं
प्रत्येकानें आपल्या बंधूस बंधमुक्त करावें; त्यानें सहा वर्षें
तुझें दास्य केल्यावर त्याला तूं मुक्त करून रवाना करावें;
पण तुमच्या पूर्वजांनीं माझें ऐकलें नाहीं, आपला कान
दिला नाहीं. १५ तुम्ही तर अलीकडे वळून माझ्या
दृष्टीनें नीट तें करूं लागलां होतां; तुमच्यांतील प्रत्येकानें
आपल्या शेजाऱ्याचें स्वातंत्र्य प्रसिद्धपणें ठरविलें, व
ज्या माझ्या मंदिरास माझें नाम दिलें आहे त्यांत
तुम्हीं मजसमक्ष करार केला; १६ पण तुम्हीं पुनः बद-
लून माझ्या नामाची अप्रतिष्ठा केली व प्रत्येकानें ज्या
आपल्या दासास व दासीस वाटेल तिकडे जाण्याचें
स्वातंत्र्य दिलें होतें त्यांस तुम्हीं परत येण्यास लाविलें, व
त्यांनीं तुमचे दास व दासी व्हावें म्हणून त्यांस तुम्हीं
आपले ताबेदार केलें. १७ यास्तव परमेश्वर म्हणतो,
तुम्हीं प्रत्येकानें आपल्या बंधूस व आपल्या शेजाऱ्यास
मोकळें करावें, हें माझें सांगणें तुम्हीं ऐकलें नाहीं;
म्हणून परमेश्वर म्हणतो, पाहा, मी तुम्हांस तरवार,
मरी व दुष्काळ यांच्यायोगें नाश पावावयास मोकळे
सोडून देतों; पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांना दहशत
पोहंचेल असें मी तुमचें करीन; १८ आणि ज्या
मनुष्यांनीं माझा करार उल्लंघिला व मजसमोर केलेल्या
कराराच्या शर्ती पाळिल्या नाहींत त्यांचें, जें वासरूं
त्यांनीं कापून दुभागिलें व त्याच्या दोहों भागांमधून
ते चालून गेले, त्या वासराप्रमाणें करीन. १९ यहूदाचे
सरदार व यरुशलेमाचे सरदार, खोजे, याजक व
देशांतील सर्व लोक वासराच्या दोन भागांतून चालून
गेले, २० त्यांस त्यांच्या वैऱ्यांच्या हातीं देईन, त्यांच्या
जिवांस टपणाऱ्यांच्या हातीं देईन, म्हणजे त्यांचीं प्रेतें
आकाशांतील पक्ष्यांस व पृथ्वीवरील श्वापदांस भक्ष्य
होतील; २१ आणि यहूदाचा राजा सिदकीया व त्याचे
सरदार यांस मी त्यांच्या वैऱ्यांच्या हातीं देईन, त्यांच्या
जिवांस टपणाऱ्यांच्या हातीं देईन व बाबेलच्या राजाचें
जें सैन्य तुम्हांपुढून निघून गेलें आहे त्याच्या हातीं
देईन. २२ परमेश्वर म्हणतो, पाहा, मी आज्ञा करून
त्यांस या नगराकडे परत यावयास लावीन; ते
त्याबरोबर लढून तें घेतील व तें अग्नीनें जाळितील;
मी यहूदाचीं नगरें ओसाड व निर्जन करीन.

३५ १ यहूदाचा राजा योशीयाचा पुत्र यहोया-
कीम याच्या काळीं परमेश्वराचें वचन यिर्मयास
प्राप्त झालें तें हें: २ रेखाब्यांच्या घराण्याकडे
जा, त्यांजबरोबर भाषण कर, आणि परमेश्वराच्या
मंदिरांत, त्यांतल्या एका कोठडींत आणून त्यांस द्राक्षारस
प्यावयास दे. ३ तेव्हां मीं याजना बिन यिर्मया बिन
हबसिन्या यास, त्याच्या बांधवांस व त्याच्या सर्व
पुत्रांस आणि रेखाब्यांच्या घराण्यांतील इतर सर्वांस
४ परमेश्वराच्या मंदिरांत आणिलें; द्वारपाळ मासेया
बिन शल्लूम याच्या कोठडीच्या वर असलेल्या सरदारांच्या
कोठडीच्या बाजूस देवाचा भक्त हानान बिन इग्दल्या
याच्या पुत्रांची कोठडी होती तींत त्यांस नेलें. ५ तेव्हां
मी त्या रेखाबवंशजांपुढें द्राक्षारसानें भरलेले कटोरे व
पेले ठेविले व त्यांस म्हणालों, द्राक्षारस प्या; ६ पण ते
म्हणाले, आम्हो द्राक्षारस पिणार नाहीं; कारण आमचा
पूर्वज रेखाब याचा पुत्र योनादाब यानें आम्हांस ताकीद
केली आहे कीं तुम्हीं व तुमच्या वंशजांनीं द्राक्षारस
कदापि पिऊं नये. ७ तुम्ही कधीं घरेंदारें बांधूं नका, शेतें
पेरूं नका, द्राक्षांचे मळे लावूं नका, त्यांची मालकीहि
पतकरूं नका; तर आपलें आयुष्य तंबूंत घालवा;
म्हणजे ज्या देशांत तुम्ही उपरी आहां त्यांत तुमचा
बहुत दिवस निभाव लागेल. ८ आमचा पूर्वज रेखाब

याचा पुत्र योनादाब यानें आम्हांस जो निर्बंध घालून
दिला तो सर्व आजवर आम्ही ऐकत आलों आहों;
आमच्या स्त्रिया, पुत्र व कन्या यांसह आम्ही कधीं
द्राक्षारस प्यालों नाहीं; ९ राहण्यास घरें बांधिलीं नाहींत;
द्राक्षीचे मळे, शेतें, बीं वगैरे आमचें कांहीं नाहीं;
१० आम्ही तंबूंत राहतों, आमचा पूर्वज योनादाब
यानें सांगितलेलें ऐकून त्या सगळ्याप्रमाणें आम्ही
वागत आलों आहों. ११ बाबेलाचा राजा नबुखद्रेस्सर
या देशावर चालून आला तेव्हां मात्र आम्हीं म्हटलें,
खास्द्यांचें सैन्य व अराम्यांचें सैन्य यांच्या भीतीस्तव
चला, आपण यरुशलेमास जाऊं; म्हणून आज आम्ही
यरुशलेमांत राहत आहों.

१२ तेव्हां परमेश्वराचें वचन यिर्मयाला प्राप्त झालें
कीं १३ सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो,
यहूदाचे लोक व यरुशलेमकर यांस जाऊन सांग कीं
माझीं वचनें ऐकण्याचा बोध तुम्ही कां घेत नाहीं?
असें परमेश्वर म्हणतो. १४ रेखाबाचा पुत्र योनादाब
यानें आपल्या वंशजांस द्राक्षारस न पिण्याविषयीं
आज्ञा केली त्याप्रमाणें त्यांच्याकडून वागणूक
होत आहे; त्यांनीं आजवर द्राक्षारसाचें सेवन
केलें नाहीं, आपल्या पूर्वजांची आज्ञा त्यांनीं
मानिली; पण मी मोठ्या निकडीनें तुम्हांस सांगत
आलों तरी तुम्हीं माझें ऐकलें नाहीं. १५ मी आपले
सर्व सेवक जे संदेष्टे त्यांस मोठ्या निकडीनें तुम्हांकडे
पाठवून सांगत आलों कीं आतां तुम्ही प्रत्येक जण
आपल्या कुमार्गापासून वळा, आपलें वर्तन सुधारा,
अन्य देवांची सेवा करण्यासाठीं त्यांच्या मागें लागूं
नका; म्हणजे जो देश मीं तुम्हांस व तुमच्या पूर्वजांस
दिला आहे त्यांस तुमची वस्ती होईल; पण तुम्हीं कान
दिला नाहीं, माझें ऐकलें नाहीं. १६ रेखाबाचा पुत्र
योनादाब याच्या वंशजांनीं, आपल्या पूर्वजानें घालून
दिलेल्या निर्बंधाचें पालन केलें आहे, पण हे लोक
माझें ऐकतना. १७ ह्यास्तव परमेश्वर, सेनाधीश देव,
इस्राएलाचा देव म्हणतो, पाहा, मी यहूदा व सर्व यरु-
शलेमकर यांजवर जें सर्व अरिष्ट आणणार म्हणून
बोललों तें आणीन; कारण मी त्यांजबरोबर बोललों
असतां त्यांनीं तें ऐकलें नाहीं, मीं त्यांस हाक मारिली
असतां त्यांनीं उत्तर दिलें नाहीं; १८ तेव्हां यिर्मया
रेखाबवंशजांस म्हणाला, सेनाधीश परमेश्वर, इस्रा-
एलाचा देव म्हणतो, तुम्ही आपला पूर्वज योनादाब याचा
निर्बंध मानिला व त्याच्या सर्व आज्ञा पाळिल्या व त्यानें
आज्ञापिल्याप्रमाणें तुम्हीं सर्व कांहीं केलें; १९ म्हणून
सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, माझ्या
सेवेस हजर राहण्यासाठीं रेखाबाचा पुत्र योनादाब
याच्या घराण्यांत कोणा पुरुषाची उणीव कधींच
पडणार नाहीं.

३६ १ यहूदाचा राजा योशीयाचा पुत्र यहो-
याकीम याच्या कारकीर्दीच्या चौथ्या वर्षी पर-
मेश्वराचें वचन यिर्मयाला प्राप्त झालें तें असें:
२ तूं ग्रंथ लिहिण्याचा पट घे; आणि योशीयाच्या काळीं
मी तुजबरोबर बोललों तेव्हांपासून आजवर इस्राएल,
यहूदा व सर्व राष्ट्रें यांविरुद्ध जीं सर्व वचनें मीं तुला
सांगितलीं तीं त्यावर लिहून काढ. ३ न जाणों यहूदाच्या
घराण्यावर जें सर्व अरिष्ट आणण्याचा माझा
बेत आहे तें ऐकून ते सर्व आपआपल्या कुमार्गापासून
वळतील आणि मी त्यांच्या दुष्कर्मांची व त्यांच्या पापाची
त्यांस क्षमा करीन. ४ तेव्हां यिर्मयानें नेरीयाचा पुत्र
बारूख याला बोलाविलें; व परमेश्वरानें यिर्मयाला जीं
वचनें सांगितलीं होतीं तीं सर्व त्याच्या तोंडचीं ऐकून
बारूखानें त्या पटावर लिहिलीं. ५ तेव्हां यिर्मयानें
बारूखाला आज्ञा केली कीं मला प्रतिबंध आहे, मला
परमेश्वराच्या मंदिरांत जातां येत नाहीं; ६ म्हणून तूं जा
व माझ्या तोंडचीं जीं परमेश्वराचीं वचनें तूं पटावर
लिहिलीं तीं उपवासाच्या दिवशीं परमेश्वराच्या मंदिरांत
लोकांच्या कानीं पडतील अशीं वाचून दाखीव; तसेंच
यहूदाच्या नगरांहून येणाऱ्या सर्वांच्या कानीं पडतील
अशीं तीं वाचून दाखीव. ७ कदाचित् ते परमेश्वरापुढें
आपली विनंति सादर करितील व आपआपल्या
कुमार्गापासून वळतील; कारण परमेश्वरानें या लोकांवर

क्रोध व संताप करीन म्हणून सांगितलें तो भारी आहे. ८ यिर्मया संदेष्ट्याच्या सांगण्याप्रमाणें नेरीयाचा पुत्र बारूख यानें सर्व कांहीं केलें; त्यानें परमेश्वराचीं वचनें परमेश्वराच्या मंदिरांत पुस्तकांतून वाचून दाखविलीं.

९ तेव्हां असें झालें कीं यहूदाचा राजा योशीयाचा पुत्र यहोयाकीम याच्या कारकीर्दीच्या पांचव्या वर्षाच्या नवव्या मासीं यरुशलेमांतले सर्व लोक व यहूदाच्या नगरांतून जे सर्व यरुशलेमास आले होते त्यांनीं परमेश्वरापुढें जाहीर उपवास नेमिला. १० मग परमेश्वराच्या मंदिराच्या नवीन द्वाराच्या देवडीजवळ वरच्या चौकांतील शाफानाचा पुत्र गमर्‍या लेखक याच्या दिवाणखान्यांत बारूखानें परमेश्वराच्या मंदिरांत, ग्रंथांत लिहिलेलीं यिर्मयाचीं वचनें सर्व लोकांच्या कानीं पडतील अशीं वाचून दाखविलीं. ११ मीखाया बिन गमर्‍या बिन शाफान यानें त्या ग्रंथांतलीं परमेश्वराचीं सर्व वचनें ऐकलीं, १२ तेव्हां तो राजगृहांत लेखकाच्या दिवाणखान्यांत गेला, तों तेथें सर्व सरदार बसले होते; अलीशामा लेखक, दलाया बिन शमाया, एलनाथान बिन अखबोर, गमर्‍या बिन शाफान, सिदकीया बिन हनन्या व इतर सर्व सरदार तेथें होते. १३ तेव्हां बारूखानें त्या ग्रंथांतलीं लोकांच्या कानीं पाडलेलीं जीं सर्व वचनें मीखायानें ऐकलीं होतीं तीं त्यानें त्यांस कळविलीं. १४ तेव्हां त्या सर्व सरदारांनीं यहूदी बिन नथन्या बिन शलेम्या बिन कुशी याच्या हातीं बारूखास असें सांगून पाठविलें कीं ज्या पटांतून तूं लोकांस वाचून दाखविलें तो हातीं घेऊन ये. तेव्हां नेरीयाचा पुत्र बारूख आपल्या हातीं पट घेऊन त्यांजकडे आला. १५ त्यांनीं त्याला म्हटलें, आतां बसून तीं आमच्या कानीं पाड; तेव्हां बारूखानें त्यांच्या कानीं तीं पाडिलीं. १६ त्यांनीं तीं सर्व वचनें ऐकल्यावर ते भयभीत होऊन एकमेकांकडे वळले व बारूखास म्हणाले, आम्ही हीं सर्व वचनें राजाला अवश्य सांगूं. १७ त्यांनीं बारूखास विचारिलें, त्याच्या तोंडचीं हीं सर्व वचनें तूं कशीं लिहिलीं हें आम्हांस सांग पाहूं. १८ बारूखानें त्यांस म्हटलें, त्यानें स्वमुखानें हीं सर्व वचनें मला सांगितलीं. व मीं तीं शाईनें या पुस्तकांत लिहिलीं. १९ मग ते सरदार बारूखास म्हणाले, जा, यिर्मया व तूं लपून राहा; तुम्ही कोठें राहाल हें कोणाला कळूं देऊं नका. २० मग ते चौकांत राजाकडे गेले; तो पट त्यांनीं अलीशामा लेखकाच्या दिवाणखान्यांत ठेविला होता; त्यांनीं तीं सर्व वचनें राजाच्या कानीं पाडिलीं. २१ तेव्हां राजानें तो पट आणण्यास यहूदीस पाठविलें; त्यानें तो अलीशामा लेखकाच्या दिवाणखान्यांतून आणिला. तो यहूदीनें राजास व राजाभोंवतीं उभे राहणार्‍या सर्व सरदारांस वाचून दाखविला. २२ हा नववा महिना असून राजा हेमंतगृहांत बसलेला होता, व त्याच्यापुढें शेगडी पेटलेली होती. २३ तेव्हां असें झालें कीं यहूदीनें तीनचार पानें वाचून दाखविल्यावर राजानें तो पट चाकूनें कापून शेगडींतल्या पेटत्या आगींत टाकिला; येणेंप्रमाणें तो सगळा त्या शेगडीच्या आगींत भस्म झाला. २४ राजानें व त्याच्या सेवकांनीं हीं सर्व वचनें ऐकलीं तेव्हां ते कोणी घाबरले नाहींत, कोणीं आपलीं वस्त्रें फाडिलीं नाहींत. २५ राजानें तो पट जाळूं नये म्हणून एलनाथान, दलाया व गमर्‍या यांनीं त्याची विनंति केली पण त्यानें त्यांचें ऐकलें नाहीं. २६ तेव्हां राजानें राजपुत्र यमेल, अज्रीएलपुत्र सराया, व अब्देलपुत्र शलेम्या यांस अशी आज्ञा केली कीं बारूख लेखक व यिर्मया संदेष्टा यांस धरून आणावें; पण परमेश्वरानें त्यांस लपविलें.

२७ यिर्मयाच्या तोंडचीं वचनें बारूखानें ज्या पटावर लिहिलीं होतीं तो राजानें जाळून टाकिल्यावर परमेश्वराचें वचन यिर्मयास प्राप्त झालें कीं, २८ तूं पुनः दुसरा पट घे व यहूदाचा राजा यहोयाकीम यानें जाळिलेल्या पहिल्या पटावर जीं वचनें होतीं तीं सर्व त्यावर लिही; २९ आणि यहूदाचा राजा यहोयाकीम याला तूं असें सांग, परमेश्वर म्हणतो, तूं हा पट जाळून म्हटलें, तूं यांवर कां लिहिलें कीं बाबेलचा राजा येईलच व या देशाचा विध्वंस करील, आणि यांतून मनुष्य व पशु यांचें निर्मूलन करील? ३० वास्तव

यहूदाचा राजा यहोयाकीम याविषयीं परमेश्वर म्हणतो,
दाविदाच्या आसनावर बसण्यास त्याचा कोणी राहाव-
याचा नाहीं व त्याचें शव फेकण्यांत येईल, तें दिवसाच्या
उन्हांत व रात्रीच्या हिवांत पडून राहील. ३१ मी
त्यास, त्याच्या संततीस व त्याच्या सेवकांस त्यांच्या
दुष्कर्मांबद्दल शिक्षा करीन, आणि तें, यरुशलेमनिवासी
व यहूदाचे लोक यांजवर जें अरिष्ट आणीन म्हणून मी
बोललों तें सर्व त्यांच्यावर आणीन, पण त्यांनीं माझें
ऐकलें नाहीं. ३२ मग यिर्मयानें दुसरा पट घेऊन
नेरीयाचा पुत्र बारूख लेखक यास दिला; तेव्हां
यहूदाचा राजा यहोयाकीम यानें जो ग्रंथ अग्नींत
जाळून टाकिला होता त्यांतलीं सर्व वचनें त्यानें त्यावर
यिर्मयाच्या सांगण्यावरून लिहिलीं, व त्यांत तशाच
दुसऱ्या बहुत वचनांची भर घातली.

३७ १ यहोयाकीमाचा पुत्र कोन्या[1] याच्या
जागीं योशीयाचा पुत्र सिद्कीया राज्य करूं
लागला; यास बाबेलचा राजा नबुखद्रेस्सर यानें
यहूदा देशावर राजा केलें होतें; २ परंतु त्यानें, त्याच्या
सेवकांनीं व देशच्या लोकांनीं, यिर्मया संदेष्ट्याच्या-
द्वारें जीं वचनें परमेश्वरानें सांगितलीं होतीं तीं
ऐकलीं नाहींत.

३ तेव्हां सिद्कीया राजानें शलेम्याचा पुत्र यहूकल
व मासेयाचा पुत्र सफन्या याजक यांस यिर्मया
संदेष्ट्याकडे सांगून पाठविलें कीं आम्हांसाठीं आमचा
देव परमेश्वर याजकडे प्रार्थना कर. ४ त्या वेळीं
यिर्मयाचें लोकांत जाणेंयेणें होतें कारण त्याला अद्यापि
बंदिशाळेंत टाकिलें नव्हतें. ५ त्या समयीं मिसर देशां-
तून फारोचें सैन्य आलें; ही वार्ता यरुशलेमास वेढा
घालणारे खास्दी ऐकून यरुशलेम सोडून गेले.
६ तेव्हां परमेश्वराचें वचन यिर्मया संदेष्ट्याला प्राप्त
झालें तें असें: ७ परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो,
यहूदाच्या राजानें तुम्हांस मजकडे विचारावयास पाठ-
विलें आहे, तर त्याला सांगा, पाहा, फारोचें सैन्य तुमची
कुमक करण्यास आलें आहे तें मिसरास स्वदेशीं परत
जाईल. ८ खास्दी लोक परत येऊन या नगराशीं लढतील
व तें घेऊन अग्नीनें जाळितील. ९ परमेश्वर म्हणतो,
खास्दी लोक आम्हांला खरोखर सोडून जातील असें
म्हणून आपली फसवणूक करून घेऊं नका; ते निघून
जावयाचे नाहींत. १० कारण तुम्हांबरोबर लढणाऱ्या
खास्द्यांच्या अवघ्या सैन्याचा जरी तुम्हीं पराभव केला
व त्यांतले अगदीं घायाळ झालेले मात्र कांहीं उरले
तरी ते सर्व आपआपल्या तंबूंत उठून उभे राहतील व
हें नगर अग्नीनें जाळितील.

११ फारोच्या सैन्याच्या भीतीनें खास्द्यांचें सैन्य
यरुशलेम सोडून गेलें तेव्हां असें झालें कीं
१२ लोकांतला आपला वांटा मिळवावा म्हणून यिर्मया
यरुशलेमाहून बन्यामीन प्रांतांत जाण्यास निघाला.
१३ तो बन्यामिनाच्या वेशींत प्रवेश करितो तों तेथें
पहारेकऱ्यांचा नायक इरीया बिन शलेम्या बिन हनन्या
होता; त्यानें यिर्मया संदेष्ट्याला पकडून म्हटलें, तूं
खास्द्यांकडे फितूर होऊन जात आहेस. १४ यिर्मया
म्हणाला, हें खोटें आहे; मी खास्द्यांकडे फितूर होऊन
जात नाहीं; पण इरीया त्याचें ऐकेना; त्यानें यिर्मयाला
पकडून सरदारांकडे नेलें. १५ सरदारांनीं यिर्मयावर
संतापून त्याला मार दिला व योनाथान लेखकाच्या
घरांत अटकेंत ठेविलें; त्यांनीं त्या घराचा तुरुंग केला
होता. १६ यिर्मया तेथल्या तळघरांत व अंधारकोठड्यांत
राहिला; तेथें त्यानें बहुत दिवस काढिले.
१७ मग सिद्कीया राजानें त्याला बोलावून आणिलें;
तेव्हां राजानें आपल्या वाड्यांत त्याला एकांतीं
विचारिलें कीं परमेश्वराकडचें कांहीं वचन आहे काय?
यिर्मया म्हणाला, आहे: तो म्हणतो, आपणाला बाबेलच्या
राजाच्या हातीं देण्यांत येईल. १८ यिर्मया सिद्कीया
राजाला आणखी म्हणाला, मी आपल्याविरुद्ध, आपल्या
सेवकांविरुद्ध, किंवा या लोकांविरुद्ध कोणतें पाप केलें कीं
तुम्हीं मला तुरुंगांत टाकिलें? १९ तुमच्या ज्या
संदेष्ट्यांनीं भविष्य केलें कीं बाबेलचा राजा तुम्हांवर
व या देशावर चाल करून येणार नाहीं ते कोठें

१ अध्याय २२:२४ टीप पाहा.

आहेत ? २० आतां, अहो माझे स्वामिराज, माझें
ऐका; माझी विनंति आपणाला मान्य होवो; मला त्या
योनाथान लेखकाच्या घरांत परत पाठवूं नका;
पाठवाल तर तेथें मी मरेन. २१ मग सिद्कीया
राजाच्या आज्ञेनें त्यांनीं यिर्मयाला पहारेकऱ्यांच्या
चौकांत ठेविलें आणि नगरांतील सर्व भाकरी संपेपर्यंत
भटारआळींतून रोज त्याला एक रोटी मिळत असे.
याप्रमाणें यिर्मया पहारेकऱ्यांच्या चौकांत राहिला.

३८ १ मग यिर्मयानें सर्व लोकांस जीं वचनें
सांगितलीं तीं शफाट्या बिन मत्तान, गदल्या
बिन पशहूर, युकाल बिन शलेम्या व पशहूर
बिन मल्कीया यांनीं ऐकलीं, तीं हीं: २ परमेश्वर
म्हणतो, जो या नगरांत राहील तो तरवारीनें, दुष्काळानें
व मरीनें मरेल; पण जो खास्द्यांकडे जाईल तो
जगेल, तो जिवानिशीं सुटेल. ३ परमेश्वर म्हणतो, हें
नगर खात्रीनें बाबेलच्या राजाच्या सैन्याच्या हातीं जाईल
व तो तें घेईल. ४ मग सरदार राजाला म्हणाले, या
मनुष्याला जिवें मारा; कारण असलें भाषण करून या
नगरांत राहिलेल्या योद्ध्यांचे व सर्व लोकांचे हात तो
निर्बळ करितो; हा मनुष्य या लोकांचें हित नव्हे तर
नुकसान करावयास पाहतो. ५ तेव्हां सिद्कीया राजा
म्हणाला, पाहा, तो तुमच्या हातीं आहे; राजाला तुमच्या
मर्जीविरुद्ध कांहीं करितां येत नाहीं. ६ मग राज-
पुत्र मल्कीया याची पहारेकऱ्यांच्या चौकांत विहीर होती
तींत त्यांनीं यिर्मयास नेऊन टाकिलें; त्यांनीं यिर्मयाला
दोरांनीं खालीं उतरिलें. त्या विहिरींत पाणी नव्हतें.
चिखल होता; यिर्मया त्या चिखलांत रुतला. ७ त्यांनीं
यिर्मयाला विहिरींत टाकिलें असें राजगृहांतला एबद-
मलेख कुशी खोजा यानें ऐकलें; त्या प्रसंगीं राजा
बन्यामिनी वेशींत बसला होता. ८ एबद-मलेख राज-
गृहांतून निघाला व राजाकडे जाऊन म्हणाला, ९ स्वामी-
महाराज, या लोकांनीं यिर्मया संदेष्ट्याला जें सर्व केलें
तें फार वाईट केलें; त्यांनीं त्याला विहिरींत टाकिलें;
तो आहे तेथें उपासमार होऊन मरेल, कारण नगरांत
कांहीं अन्न उरलें नाहीं. १० तेव्हां राजानें एबद-मलेख
कुशी याला आज्ञा केली कीं येथून तीस[1] माणसें बरोबर
घेऊन जा आणि यिर्मया संदेष्ट्याला मृत्यु प्राप्त झाला
नाहीं तों त्याला विहिरींतून काढ. ११ एबद-मलेख
बरोबर माणसें घेऊन खजिन्याच्या खालील राजगृहांत
गेला; तेथून त्यानें जुनेपुराणे फडके व कुजट चिंध्या
घेतल्या, आणि दोरांनीं त्या विहिरींत यिर्मयाकडे पोहच-
विल्या. १२ एबद-मलेख कुशी यिर्मयाला म्हणाला,
हे जुनेपुराणे फडके व कुजट चिंध्या दोरांच्या आंत ठेवून
आपल्या बगलांखालीं लाव; तसें यिर्मयानें केलें.
१३ तेव्हां त्यांनीं यिर्मयाला दोरांनीं विहिरींतून वर ओढून
घेतलें; मग यिर्मया पहारेकऱ्यांच्या चौकांत राहिला.
१४ नंतर सिद्कीया राजानें यिर्मया संदेष्ट्यास
बोलावणें पाठवून परमेश्वराच्या मंदिराच्या तिसऱ्या
द्वाराच्या देवडींत आणविलें; राजा यिर्मयाला म्हणाला,
मी तुला एक गोष्ट विचारितों; मजपासून कांहीं लपवूं नको.
१५ यिर्मया सिद्कीयाला म्हणाला, मीं आपणाला ती सांगि-
तली तर आपण मला खरोखर मारून टाकणार नाहीं ना ?
मीं आपणाला मसलत दिली तर आपण ती ऐकावयाचे नाहीं.
१६ सिद्कीयानें गुप्तपणें यिर्मयाला प्रतिज्ञापूर्वक म्हटलें,
आमचा जीव ज्यानें उत्पन्न केला त्या परमेश्वराच्या
जीविताची शपथ, मी तुला जिवें मारणार नाहीं, व
तुझा प्राण घेऊं पाहणाऱ्या ह्या लोकांच्या हातीं तुला
देणार नाहीं. १७ मग यिर्मया सिद्कीयाला म्हणाला,
परमेश्वर, सेनाधीश देव, इस्राएलाचा देव म्हणतो, तूं
बाबेलच्या राजाच्या सरदारांकडे गेलास तर तुझा जीव
वांचेल व हें नगर अग्नीनें जाळण्यांत येणार नाहीं; तूं व तुझें
घराणें बचावेल; १८ पण तूं बाबेलच्या राजाच्या
सरदारांकडे न गेलास तर हें नगर खास्दी लोकांच्या
हातीं देण्यांत येईल, ते तें अग्नीनें जाळितील व तूं
त्यांच्या हातून सुटणार नाहींस. १९ सिद्कीया राजा
यिर्मयास म्हणाला, जे यहूदी फितून खास्द्यांकडे गेले
आहेत त्यांची मला भीति वाटते कीं ते मला त्यांच्या
स्वाधीन करून माझा उपहास करितील. २० यिर्मया
म्हणाला, ते तुला त्यांच्या स्वाधीन करणार नाहींत.

[1] पाठभेद : तीन.

मी तुला जें सांगत आहें ती परमेश्वराची वाणी
मान असें मी तुला विनवितों, म्हणजे तुझें बरें होईल
व तुझा प्राण वांचेल; २१ पण तूं निघून जाण्यास
अमान्य असलास तर परमेश्वरानें मला प्रगट
केलेलें वचन हें आहे: २२ पाहा, यहूदाच्या राजाच्या
घरीं ज्या स्त्रिया उरल्या आहेत त्या सर्वांस बाबेलच्या
राजाच्या सरदारांकडे आणितील आणि त्या
म्हणतील, तुझ्या जिवलग मित्रांनीं तुला दगा दिला,
त्यांनीं तुला चीत केलें व तुझे पाय चिखलांत रुतले
असतां ते निघून गेले आहेत. २३ तुझीं सर्व बायका-
पोरें खास्द्यांकडे नेतील; तूं त्यांच्या हातून सुटणार
नाहींस, बाबेलच्या राजाच्या हातीं पडशील; तूं हें
नगर अग्नीनें जाळण्यास कारण होशील. २४ सिद्कीया
यिर्मयाला म्हणाला, हीं वचनें कोणाला कळूं देऊं नको,
म्हणजे तूं ठार व्हावयाचा नाहींस; २५ पण मी तुझ्या-
बरोबर बोललों असें ऐकून सरदार तुजकडे आले व
तुला म्हणाले कीं तूं राजाला काय बोललास तें आम्हांला
सांग; आम्हांपासून कांहीं लपवूं नको, आम्ही तुला ठार
मारणार नाहीं; राजा तुला काय बोलला तेंहि सांग;
२६ तर तूं त्यांस म्हण, राजानें मला योनाथानाच्या घरीं
मरावयास परत पाठवूं नये असा मीं त्याला अर्ज केला.
२७ मग त्या सर्व सरदारांनीं यिर्मयाकडे येऊन त्याला
विचारिलें; तेव्हां राजानें त्याला जे शब्द बोलण्याची
आज्ञा केली होती त्या सर्व शब्दांनीं त्यानें त्यांस उत्तर
केलें. ते त्याच्याबरोबर आणखी कांहीं बोलले नाहींत;
कारण त्यांना ती गोष्ट समजली नाहीं. २८ याप्रमाणें
यरुशलेम हस्तगत होई तोंवर यिर्मया पहारेकऱ्यांच्या
चौकांत राहिला.

३९ १ यहूदाचा राजा सिद्कीया याच्या कार-
कीर्दीच्या नवव्या वर्षाच्या दहाव्या मासीं
बाबेलाचा राजा नबुखद्रेस्सर व त्याचें सर्व सैन्य
यरुशलेमावर चालून आलें व त्यांनीं त्यास वेढा घातला;
२ सिद्कीयाच्या कारकीर्दीच्या अकराव्या वर्षी, चौथ्या
मासीं, महिन्याच्या नवव्या दिवशीं नगराच्या तटास
त्यांनीं खिंड पाडली; अशा प्रकारें यरुशलेम हस्तगत
केल्यावर असें झालें कीं ३ बाबेलच्या राजाचे सर्व
सरदार म्हणजे नेर्गल-शरेसर, समगार-नबो, सर्सखीम,
रब-सारीस, नेर्गल-शरेसर, रब-माग व बाबेलाच्या
राजाचे वरकड सरदार हे सर्व मधल्या वेशींत येऊन
बसले. ४ हें पाहून यहूदाचा राजा सिद्कीया व सर्व
योद्धे यांनीं पलायन केलें; ते रात्रीं राजाच्या बागेच्या
वाटेनें, दोहों तटांमधल्या वेशीनें नगराबाहेर निघून
गेले; राजा अराबाच्या मार्गानें गेला. ५ खास्द्यांच्या
सैन्यानें त्यांचा पाठलाग करून यरीहोच्या मैदानांत
सिद्कीयास गांठिलें; त्यांनीं त्याला पकडून हमाथ
प्रांतांतलें रिब्ला येथें बाबेलचा राजा नबुखद्रेस्सर याज-
पुढें आणिलें; त्यानें त्याची शिक्षा ठरविली. ६ रिब्ला
येथें बाबेलाच्या राजानें सिद्कीयाच्या डोळ्यांदेखत
त्याचे पुत्र वधिले; त्याप्रमाणेंच बाबेलच्या राजानें
यहूदाचे सर्व मानकरी वधिले. ७ आणखी त्यानें सिद्-
कीयाचे डोळे फोडून त्याला बाबेलास रवाना करण्या-
साठीं बेड्यांनीं जखडिलें. ८ खास्दी लोकांनीं राजगृह
व लोकांचीं घरें अग्नीनें जाळिलीं व यरुशलेमाचा कोट
मोडून टाकिला. ९ तेव्हां गारद्यांचा नायक नबूजरदान
यानें नगरांत अवशिष्ट राहिलेले लोक, आणि जे फितून
त्याच्याकडे गेले होते ते आणि जे बाकी लोक शेष
राहिले होते ते अशा सर्वांस कैद करून बाबेलास
नेलें. १० तथापि जे लोक लाचार असून ज्यांच्या-
जवळ कांहींएक नव्हतें त्यांस गारद्यांचा नायक नबू-
जरदान यानें यहूदा देशांत राहूं दिलें; त्याच प्रसंगीं
त्यानें त्यांस द्राक्षांचे मळे व शेतें दिलीं. ११ यिर्मया-
विषयीं तर बाबेलचा राजा नबुखद्रेस्सर यानें गारद्यांचा
नायक नबूजरदान यास ताकीद केली कीं १२ त्याला
नेऊन त्याची चांगली व्यवस्था ठेव; त्याला कांहीं इजा
करूं नको; तो तुला सांगेल तशी त्याची व्यवस्था लाव.
१३ तेव्हां गारद्यांचा नायक नबूजरदान यानें आणि
नबूशजबान, रब-सारीस, नेर्गल-शरेसर, रब-माग व
बाबेलच्या राजाचे सर्व मुख्य अमलदार १४ यांनीं
माणसें पाठवून यिर्मयास पहारेकऱ्यांच्या चौकांतून
काढिलें व घरीं न्यावें म्हणून त्यास गदल्या बिन

अहिकाम बिन शाफान याच्या स्वाधीन केलें; येणें-
प्रमाणें तो लोकांत जाऊन राहिला.
१५ यिर्मया पहारेकऱ्यांच्या चौकांत कैदी होता
तेव्हां परमेश्वराचें वचन त्याला प्राप्त झालें तें असें:
१६ जा, एबद्-मलेख कूशी याला सांग कीं सेनाधीश
परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, पाहा, मी आपल्या
वचनाप्रमाणें या नगराचें हित नव्हे तर अहित
होईल असें करीन; त्या दिवशीं तुझ्यादेखत तीं वचनें
पूर्ण होतील. १७ तुला तर त्या दिवशीं मी मुक्त
करीन असें परमेश्वर म्हणतो; ज्यांची तुला भीति
वाटते त्यांच्या हातीं तुला देणार नाहींत. १८ मी
खात्रीनें तुझा बचाव करीन; तूं तरवारीनें पडणार
नाहींस, तूं जिवानिशीं सुटशील; कारण तूं मजवर
भिस्त ठेविली असें परमेश्वर म्हणतो.

४० १ गारद्यांचा नायक नबूजरदान यानें यरु-
शलेम व यहूदा यांतील जे लोक बंदिवान करून
बाबेलास नेले त्या सर्वांबरोबर यिर्मयासहि
बेड्या घालून रामा येथें आणिलें होतें; तेथें त्यानें
यिर्मयाची सुटका केल्यानंतर यिर्मयाला वचन प्राप्त झालें
तें हें: २ गारद्यांचा नायक यिर्मयाला बोलावून म्हणाला,
तुझा देव परमेश्वर यानें हें अरिष्ट या स्थळावर येईल
असें जाहीर केलें; ३ परमेश्वरानें तें आणिलें व
आपल्या म्हणण्याप्रमाणें केलें; तुम्हीं परमेश्वराविरुद्ध
पाप केलें व त्याची वाणी मानिली नाहीं म्हणून हें
तुमच्यावर आलें. ४ आतां पाहा, आज तुझ्या हातांत
असलेल्या बेड्यांपासून मी तुला मुक्त करितों; तुला मज-
बरोबर बाबेलास येणें बरें वाटलें तर ये, मी तुझी
चांगली व्यवस्था ठेवीन; पण मजबरोबर बाबेलास येणें
तुला बरें न वाटलें तर येऊं नको; पाहा, सगळा देश
तुजपुढें आहे; तुला बरें व सोईचें वाटेल तिकडे जा.
५ तो परतला नाहीं तोंच तो त्याला म्हणाला, गदल्या
बिन अहीकाम बिन शाफान यास बाबेलच्या राजानें
यहूदाच्या नगरांवर अधिपति नेमलें आहे त्याजकडे
परत जा, व त्याच्याबरोबर लोकांमध्यें जाऊन वस्ती
कर; किंवा तुला सोईचें वाटेल तेथें जा. मग गारद्यांच्या
नायकानें त्याला अन्नसामग्री व इनाम देऊन रवाना
केलें. ६ तेव्हां यिर्मया निघून मिस्पा येथें गदल्या बिन
अहीकाम याजकडे गेला व देशांत जे लोक उरले होते
त्यांच्यामध्यें जाऊन राहिला.
७ बाबेलच्या राजानें गदल्या बिन अहीकाम यास
देशाचा अधिपति नेमून पुरुष, स्त्रिया, मुलें, देशां-
तील सर्व लाचार व ज्या कोणास पकडून बाबेलास
नेलें नव्हतें ते सर्व त्याच्या स्वाधीन केले आहेत असें
जेव्हां रानावनांत असलेल्या सेनानायकांनीं व त्यांच्या
लोकांनीं ऐकलें, ८ तेव्हां ते, म्हणजे इश्माएल बिन
नथन्या, कारेहपुत्र योहानान व योनाथान, सराया
बिन तान्हुमेथ, नटोफाथी एफै याचे पुत्र, व यजन्या
(हा एका माकाथाचा पुत्र) हे व त्याचे लोक गदल्याकडे
मिस्पास आले. ९ गदल्या बिन अहीकाम बिन शाफान
यानें त्यांस व त्यांच्या लोकांस शपथेवर सांगितलें कीं
खास्द्यांची सेवा करण्यास भिऊं नका; देशांत वस्ती
करा, बाबेलच्या राजाची सेवा करा, म्हणजे तुमचें
कल्याण होईल. १० पाहा मी तर जे खास्दी आम्हां-
कडे येतील त्यांच्या तैनातीसाठीं मिस्पा येथें राहतों; पण
तुम्ही द्राक्षारस, ग्रीष्म ऋतूंतील फळें व तेल यांचा संचय
करून आपल्या भांड्यांत भरून ठेवा व तुम्ही ताब्यांत
घेतलेल्या नगरांत राहा. ११ त्याचप्रमाणें मवाबांत
अम्मोनी लोकांमध्यें, अदोमांत व सर्व देशांत जे यहूदी
होते त्या सर्वांनीं जेव्हां ऐकलें कीं बाबेलच्या राजानें
यहूदाचा अवशेष देशांत राहूं दिला आहे व त्याजवर
गदल्या बिन अहीकाम बिन शाफान नेमिला आहे,
१२ तेव्हां ज्या ज्या ठिकाणीं त्यांस हाकून दिलें होतें
तेथून सर्व यहूदी परत यहूदा देशांत मिस्पा येथें
गदल्याकडे आले व त्यांनीं द्राक्षारस व ग्रीष्म ऋतूंतील
फळें यांचा मोठा संचय केला.
१३ याखेरीज योहानान बिन कारेह व रानावनांत
असलेले सर्व सेनानायक हे मिस्पा येथें गदल्याकडे
आले. १४ ते त्याला म्हणाले, अम्मोनी लोकांचा राजा
बालीस यानें आपला जीव घेण्यासाठीं नथन्याचा पुत्र

इस्माएल यास पाठविलें आहे हें आपणाला ठाऊक आहे
काय ? पण गदल्या बिन अहीकाम याला त्यांचें खरें
वाटेना. १५ तेव्हां योहानान बिन कारेह गदल्यास
मिस्पा एथें गुप्तपणें म्हणाला, मला जाऊन इस्माएल
बिन नथन्या यास ठार करूं द्या; हें कोणाला कळावयाचें
नाहीं; त्यानें आपला प्राण कां घ्यावा ? घेतल्यास आपणाकडे
जमलेले सर्व यहूदी पांगतील व यहूदाच्या अवशेषाचा
नाश होईल; १६ पण गदल्या बिन अहीकाम हा
योहानान बिन कारेह यास म्हणाला, असें करूं नको;
कारण तूं इस्माएलविषयीं खोटेंनाटें सांगत आहेस.

४१
१ सातव्या महिन्यांत असें झालें कीं इस्मा-
एल बिन नथन्या बिन अलीशामा, जो राज-
वंशांतला असून राजाच्या मुख्य अमलदारांपैकीं
होता तो व त्याजबरोबर दहा माणसें हीं गदल्या बिन
अहीकाम याजकडे मिस्पा एथें आलीं; मिस्पा एथें ते एका
पंक्तीला बसून जेवले. २ त्या प्रसंगीं इस्माएल बिन
नथन्या व त्याच्याबरोबरचीं दहा मनुष्यें ह्यांनीं उठून
गदल्या बिन अहीकाम बिन शाफान ज्यास बाबेलच्या
राजानें देशावर अधिपति म्हणून नेमिलें होतें त्यास
तरवारीनें ठार मारिलें. ३ त्याप्रमाणेंच मिस्पा एथें गदल्या-
जवळ जे सर्व यहूदी होते त्यांस व तेथें असलेले खास्दी
योद्धे यांसहि इस्माएलानें जिवें मारिलें. ४ त्यानें
गदल्याचा वध केला ही गोष्ट बाहेर फुटण्यापूर्वी दुसऱ्या
दिवशीं असें झालें कीं ५ शखेम, शिलो व शोमरोन येथून
ऐशीं मनुष्यें आलीं; त्यांच्या दाढ्या मुंडलेल्या, त्यांचीं
वस्त्रें फाडिलेलीं, त्यांच्या अंगास घाय झालेले, व पर-
मेश्वराच्या मंदिरांत अर्पावयासाठीं हातीं अन्नार्पणें व
ऊद असलेलीं अशीं तीं आलीं. ६ इस्माएल बिन नथन्या
हा मिस्पा येथून त्यांस सामोरा गेला; तो वाटेनें रडत
गेला; त्यांची भेट झाल्यावर तो त्यांस म्हणाला, गदल्या
बिन अहीकाम याजकडे चला. ७ ते शहराच्या मध्य-
भागीं आल्यावर असें झालें कीं इस्माएल बिन नथन्या
यानें व त्याच्या साथीदारांनीं त्यांस जिवें मारून विहिरींत
फेकून दिलें; ८ पण त्यांपैकीं दहा जण इस्माएलास
म्हणाले कीं आम्हांस मारून टाकूं नको; कारण
आमच्याजवळ शेतांत लपवून ठेविलेला गहूं, जव,
तेल व मध यांचा सांठा आहे. तेव्हां त्यानें त्यांस सोडून
दिलें, त्यांच्या बांधवांबरोबर त्यांस मारिलें नाहीं.
९ इस्माएलानें पूर्वी ज्यांस मारिलें होतें त्यांचीं प्रेतें
त्यानें गदल्याच्या बाजूस एका विहिरींत टाकिलीं होतीं;
( ही विहीर आसा राजानें इस्राएलाचा राजा बाशा याच्या
भीतीनें खणिली होती; ) ही विहीर इस्माएल बिन नथन्या
यानें प्रेतांनीं भरून काढिली. १० तेव्हां इस्माएलानें
मिस्पा एथें असलेले सर्व अवशिष्ट लोक पकडून नेले;
राजकन्यांस व मिस्पा एथें राहिलेल्या सर्व लोकांस
गारद्यांचा नायक नबूजरदान यानें गदल्या बिन अहीकाम
याच्या स्वाधीन केलें होतें त्यांस नेलें; इस्माएल बिन
नथन्या यानें त्यांस बंदिवान करून नेलें, व तो अम्मोनी
लोकांकडे जावयास निघाला.

११ मग योहानान बिन कारेह व त्याच्याबरोबर
असलेले सैन्याचे सर्व नायक यांनीं इस्माएल बिन
नथन्या यानें केलेल्या सर्व दुष्कर्मांची बातमी ऐकली.
१२ तेव्हां ते बरोबर सर्व माणसें घेऊन इस्माएल बिन
नथन्या याजशीं लढावयास गेले; त्यांनीं गिबोनाजवळ
मोठा तलाव आहे तेथें त्यास गांठिलें. १३ तेव्हां असें
झालें कीं इस्माएलाबरोबर असलेल्या सर्व लोकांनीं
योहानान बिन कारेह व त्याबरोबरचे सैन्याचे सर्व
नायक यांस पाहिलें तेव्हां त्यांस आनंद झाला.
१४ जे सर्व लोक इस्माएलानें मिस्पा एथून पकडून
नेले होते ते उलटून योहानान बिन कारेह याजकडे
गेले; १५ पण इस्माएल बिन नथन्या आठ असामींसह
योहानानापासून निसटून अम्मोनी लोकांकडे गेला.
१६ मग गदल्या बिन अहीकाम यास मारल्यावर
इस्माएल बिन नथन्या यानें जे योद्धे, स्त्रिया, मुलें
व खोजे यांस धरून मिस्पा एथून नेलें होतें, त्यांस
योहानान बिन कारेह व त्याच्याबरोबर असलेले
सैन्याचे सर्व नायक यांनीं मिस्पा येथें त्यांच्या हातून
सोडवून गिबोनाहून परत आणिलें त्या सर्व अवशिष्ट
लोकांस घेऊन, १७ ते मिसर देशास जाण्याच्या
हेतूनें बेथलहेमनजीक गेरुथ-किमहाम येथें खास्यांच्या

भीतीनें जाऊन राहिले; १८ त्यांस त्यांचें भय होतें, कारण बाबेलच्या राजानें ज्या गदल्या बिन अहीकाम यास देशाचा अधिपति नेमिलें होतें त्यास इश्माएल बिन नथन्या यानें जिवें मारिलें होतें.

१ तेव्हां सैन्यांचे सर्व नायक आणि योहानान
४२ बिन कारेह व यजन्या बिन होशाया आणि लहान-
थोर सर्व लोक जवळ येऊन, २ यिर्मया संदेष्ट्याला म्हणाले, आमची एवढी विनंति मान्य करा; आपणाला दिसत आहे कीं आम्ही बहुतांपैकीं थोडेच राहिलों आहों; तर आम्हां सर्व अवशिष्ट लोकांसाठीं परमेश्वर आपला देव याजकडे प्रार्थना करा कीं ३ आम्हीं कोणत्या मार्गानें जावें व काय करावें हें परमेश्वर आपला देव यानें आम्हांस दाखवावें. ४ मग यिर्मया संदेष्टा त्यांस म्हणाला, मीं तुमचें म्हणणें ऐकलें आहे; पाहा, मी तुमच्या म्हणण्याप्रमाणें परमेश्वर तुमचा देव याची प्रार्थना करीन व जें कांहीं परमेश्वर तुम्हांविषयीं सांगेल तें मी तुम्हांस कळवीन; तुम्हांपासून कांहीं लपविणार नाहीं. ५ ते यिर्मयास म्हणाले, परमेश्वर आपला देव आपल्या हस्तें जें वचन आम्हांस सांगून पाठवील त्या सर्वांप्रमाणें आम्हीं न केलें तर परमेश्वर आमच्याविरुद्ध खरा व विश्वसनीय साक्षी असो. ६ परमेश्वर आमचा देव याजकडे आम्ही आपणाला पाठवितों, त्याचें म्हणणें बऱ्याचें असो कीं वाइटाचें असो आम्ही तें ऐकूं; म्हणजे परमेश्वर आमचा देव याची वाणी ऐकल्यास आमचें कल्याण होईल.

७ दहा दिवसांनीं परमेश्वराचें वचन यिर्मयाला प्राप्त झालें, ८ तेव्हां योहानान बिन कारेह व त्याच्या बरोबरचे सैन्यांचे सर्व नायक व लहानथोर सर्व लोक यांस त्यानें बोलाविलें, ९ आणि त्यांस म्हटलें, तुम्हीं आपली विनंति इस्राएलाचा देव परमेश्वर याच्यापुढें सादर करण्यास मला पाठविलें; तो असें म्हणतो, १० या देशांत अजूनहि तुम्ही राहाल तर मी तुम्हांस उभारीन, पाडून टाकणार नाहीं; तुमची लावणी करीन, उपटून टाकणार नाहीं; कारण मीं तुमचें अनिष्ट केलें याचा मला अनुताप होत आहे. ११ ज्या बाबेलच्या राजाची तुम्ही भीति धरितां त्याला भिऊं नका; परमेश्वर म्हणतो, त्याला भिऊं नका; कारण तुमचा बचाव करण्यास व त्याच्या हातून तुम्हांस मुक्त करण्यास मी तुम्हांबरोबर आहें. १२ मी तुम्हांवर प्रसाद करीन म्हणजे त्याचा प्रसाद तुम्हांवर होईल व तो तुम्हांस तुमच्या देशीं वस्ती करूं देईल; १३ पण तुम्ही जर म्हणाल, आम्ही या देशांत राहणार नाहीं, म्हणजे तुमचा देव परमेश्वर याची वाणी ऐकणार नाहीं, १४ आणि असें म्हणाल, नाहीं, आम्ही मिसर देशांत जाऊं, तेथें आमच्या नजरेस युद्ध पडणार नाहीं, तेथें करण्याचा शब्द आम्हांस ऐकू येणार नाहीं व भाकरीवांचून आम्ही भुके मरणार नाहीं, आम्ही तेथेंच वस्ती करूं; १५ तर हे यहूदाचे अवशिष्ट लोकहो, तुम्ही परमेश्वराचें वचन ऐका: सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, मिसर देशांत जाऊन तेथें कांहीं दिवस राहण्याचा तुमचा निश्चयच असला तर १६ ज्या तरवारीची तुम्हांस भीति वाटत आहे ती तेथें मिसर देशांत तुम्हांस गांठील, व ज्या दुष्काळाची तुम्हांस भीति वाटते, तो मिसर देशांत तुमच्या पाठोपाठ येईल; तेथें तुम्ही मराल. १७ ज्या माणसांनीं मिसर देशांत जाऊन कांहीं दिवस राहण्याचा निश्चय केला आहे ते सर्व तरवार, दुष्काळ व मरी यांनीं मरतील; मी त्यांवर अरिष्ट आणीन तेव्हां त्यांपैकीं एकहि उरणार नाहीं किंवा सुटणार नाहीं. १८ कारण सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, माझा क्रोध व संताप यांचा जसा यरुशलेमांत राहणाऱ्यांवर वर्षाव झाला तसा तुम्ही मिसर देशांत गेल्यावर तुम्हांवर होईल, व तुम्ही निर्भर्त्सना, विस्मय, शाप व निंदा यांचे विषय व्हाल, व हें ठिकाण तुमच्या दृष्टीस पुनः पडणार नाहीं. १९ हे यहूदाचे अवशिष्ट लोकहो, परमेश्वरानें तुम्हांस सांगितलें आहे कीं मिसर देशास जाऊं नका; मी तुम्हांस आज बजावून सांगत आहें हें पक्कें लक्षांत ठेवा. २० या प्रकारें तुम्ही आपला जीव जोखमांत घातला आहे: कारण परमेश्वर तुमचा देव याकडे मला पाठवून तुम्हीं म्हटलें कीं परमेश्वर आमचा देव याची आम्हांसाठीं प्रार्थना कर व परमेश्वर आमचा देव सांगेल तें सर्व आम्हांस कळीव म्हणजे त्याप्रमाणें आम्ही करूं;

२१ तें आज मीं तुम्हांस कळविलें आहे; तरी परमेश्वर
तुमचा देव यानें माझ्या द्वारें तुम्हांस जें सांगून पाठविलें
त्यांतल्या कशाविषयींहि तुम्हीं त्याची वाणी ऐकली
नाहीं; २२ म्हणून ज्या स्थलीं जाऊन राहण्याची
तुमची मर्जी लागली आहे तेथें तुम्ही तरवार, दुष्काळ,
दुर्भिक्ष व मरी यांनीं मराल हें पक्कें समजा.

४३ १ मग असें झालें कीं परमेश्वर त्यांचा देव
यानें जीं वचनें यिर्मयाच्या हस्तें लोकांकडे
पाठविलीं तीं सर्व त्या सर्वांस सांगण्याचें
यिर्मयानें संपविलें. २ तेव्हां अजऱ्या बिन होशाया,
योहानान बिन कारेह आणि सर्व गर्विष्ठ मनुष्यें
यिर्मयाला म्हणालीं, तूं खोटें बोलतोस; तुम्ही मिसर
देशांत जाऊन कांहीं दिवस राहूं नका असें कळविण्यास
परमेश्वर आमचा देव यानें तुला पाठविलें नाहीं; ३ तर
तूं आम्हांस खास्द्यांच्या हातीं द्यावें आणि त्यांनीं
आम्हांस जिवें मारावें, आम्हांस बंदिवान करून बाबेलास
न्यावें म्हणून बारूख बिन नेरीया तुला आमच्या-
विरुद्ध मथवीत आहे. ४ योहानान बिन कारेह,
सर्व सेनानायक व सर्व लोक यांनीं यहूदा देशांत
राहण्याविषयीं परमेश्वराची वाणी ऐकली नाहीं;
५ तर ज्या सर्व राष्ट्रांत त्यांस घालविलें होतें त्यांतून
यहूदाचे जे अवशिष्ट लोक यहूदा देशांत राहण्यास
परत आले होते त्या सर्वांस योहानान बिन कारेह
व सर्व सेनानायक यांनीं आपल्याबरोबर नेलें;
६ पुरुष, स्त्रिया, मुलें, राजकन्या, यांस गारद्यांचा नायक
नबूजरदान यानें गदल्या बिन अहीकाम बिन शाफान
याच्या हवालीं केलेल्या सर्व लोकांस आणि यिर्मया संदेष्टा
आणि बारूख बिन नेरीया यांस त्यांनीं नेलें; ७ ते
मिसर देशास गेले; त्यांनीं परमेश्वराची वाणी ऐकली
नाहीं; ते तहपन्हेस एथें जाऊन पोहंचले. ८ तहपन्हेस
येथें यिर्मयाला परमेश्वराचें वचन प्राप्त झालें तें असें:
९ आपल्या हातीं मोठे धोंडे घे व यहूदाच्या लोकांसमक्ष
तहपन्हेस येथल्या फारोच्या राजगृहाच्या द्वाराशीं जो
चौक आहे त्यांत ते चुना लेपून छपवून टाक; १० आणि
त्यांस सांग, सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो,
पाहा, मी बाबेलचा राजा, माझा सेवक नबुखद्रेस्सर, यास
बोलावून आणीन, व हे जे धोंडे मीं छपवून ठेविले
आहेत त्यांवर त्याचें सिंहासन ठेवीन; मग तो त्यांवर
आपला भव्य गालिचा पसरील. ११ तो येऊन मिसर
देशावर मारा करील; जे मरावयाचे ते मरणाच्या, जे
बंदिवासांत जावयाचे ते बंदिवासाच्या व जे तरवारीनें
वधावयाचे ते तरवारीच्या स्वाधीन करण्यांत येतील. १२
शिवाय मी मिसरी दैवतांच्या गृहांत अग्नि पेटवीन: तो राजा
त्यांस जाळील व बंदिवान करून नेईल; मेंढपाळ आपलें
अंग जसें वस्त्रानें वेष्टितो तसा तो मिसर देशानें स्वतःस
वेष्टील व शांतीनें तेथून निघून जाईल. १३ तो मिसर
देशांतले जे बेथ-शेमेश त्याचे स्तंभ मोडून टाकील व
मिसर देशांतील दैवतांचीं गृहें तो अग्नीनें जाळील.

४४ १ जे यहूदी मिसर देशांत, म्हणजे मिग्दोल,
तहपन्हेस, नोफ व पथ्रोस प्रांत यांत वस्ती
करून होते त्यांजविषयीं यिर्मयाला जें वचन
प्राप्त झालें तें हें: २ सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव
म्हणतो, मीं यरुशलेमावर व यहूदाच्या सर्व नगरांवर
जें अरिष्ट आणिलें तें सर्व तुम्हीं प्रत्यक्ष पाहिलें आहे;
पाहा, आज तीं उजाड व निर्जन झालीं आहेत; ३ त्यांनीं
जाऊन धूप जाळिला व त्यांस, तुम्हांस व तुमच्या
वडिलांसहि अज्ञात असलेल्या अशा अन्य देवांची सेवा त्यांनीं
केली; असा दुष्टपणा करून त्यांनीं मला चिडविलें म्हणून असें
झालें. ४ मी तर आपले सर्व सेवक जे संदेष्टे त्यांस तुम्हांकडे
पाठवीत आलों; मोठ्या निकडीनें त्यांस तुम्हांकडे पाठवून
सांगत असें कीं या अमंगळ कर्माचा मला वीट आहे;
तें करूं नका. ५ तरी पण अन्य देवांला धूप जाळण्याचें
सोडून देऊन आपल्या दुष्टतेपासून वळण्याचें ते ऐक-
तना व आपला कान देतना. ६ ह्यामुळें माझा संताप व
क्रोध यांचा वर्षाव झाला, तो यहूदाचीं नगरें व
यरुशलेमाच्या आळ्या यांत पेटला; तीं ओसाड व
वैराण झालीं आहेत; हें आज दिसत आहे. ७ ह्यास्तव
आतां सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो:

१ अध्याय ४२:१ येथें यजन्या.

तुम्हीं आपल्या हातच्या कर्मांनीं मला चिडवावें आणि
यहूदांतले तुमचे पुरुष, स्त्रिया, बालकें व तान्हीं
यांचा उच्छेद होऊन तुमच्यांतला कोणी शिल्लक राहूं नये,
असें आपल्या जिवावर कां अरिष्ट आणितां ? ८ कारण
तुम्ही ज्या मिसर देशांत कांहीं दिवस राहण्यास गेलां
आहां त्यांत अन्य देवांस धूप जाळिल्यामुळें तुम्ही
आपला उच्छेद करून घ्याल व पृथ्वीवरच्या सर्व राष्ट्रांत
शापास व अप्रतिष्ठेस पात्र व्हाल. ९ यहूदा देशांत व
यरुशलेमाच्या आळ्यांआळ्यांतून केलेलीं तुमच्या
पूर्वजांचीं दुष्कृत्यें, यहूदाचे राजे व त्यांच्या स्त्रिया यांचीं
दुष्कृत्यें, तुमचीं स्वतांचीं व तुमच्या स्त्रियांचीं दुष्कृत्यें
यांचा तुम्हांला विसर पडला काय ? १० ते अजून
नम्र झाले नाहींत, त्यांस भीति वाटत नाहीं, व तुम्हांस
व तुमच्या पूर्वजांस मीं लावून दिलेलें आपलें धर्मशास्त्र
व आपले विधि याप्रमाणें ते चालत नाहींत. ११ ह्यामुळें
सेनाधीश परमेश्वर, इस्राएलचा देव म्हणतो, तुमचें
अनिष्ट करण्यासाठीं व सर्व यहूदाचा उच्छेद करण्या-
साठीं मी तुम्हांस विन्मुख होईन. १२ मिसर देशांत
जाऊन कांहीं दिवस राहण्याचा यहूदाच्या अवशिष्ट
लोकांनीं निश्चय केला त्या सर्वांवर माझा हात पडून
त्यांचा नायनाट होईल; मिसर देशांत ते पडतील;
तरवारीनें व दुष्काळानें त्यांचा नायनाट होईल;
लहानथोर तरवारीनें व दुष्काळानें मृत्यु पावतील; ते
निर्भर्त्सना, विस्मय, शाप व निंदा यांचे विषय
होतील. १३ मीं यरुशलेमास शिक्षा केली तशी मिसर
देशांत जाऊन राहिलेल्यांस तरवार, दुष्काळ व मरी
यांनीं शिक्षा करीन. १४ यहूदाचे जे अवशिष्ट लोक
यहूदा देशास परत जाण्याच्या आशेनें मिसर देशांत
कांहीं दिवस राहिले आहेत व स्वदेशीं परत जाऊन
राहण्याची फार अपेक्षा करीत आहेत त्यांतला कोणी
निभावणार किंवा उरणार नाहीं; पळून जाणाऱ्या
लोकांखेरीज त्यांतला कोणीहि परत जाणार नाहीं.

१५ तेव्हां आपल्या स्त्रिया अन्य देवांस धूप
जाळितात हें ज्या पुरुषांस ठाऊक होतें त्यांनीं आणि तेथें
उभ्या असलेल्या सर्व स्त्रियांचा मोठा समुदाय व मिसर
देशांतील पथ्रोसांत राहिलेले सर्व लोक यांनीं यिर्मयाला
प्रत्युत्तर केलें कीं १६ तूं परमेश्वराच्या नामानें
आम्हांस वचन सांगितलें आहे तरी आम्ही तुझें ऐक-
णार नाहीं, १७ आम्हीं पूर्वी जसें केलें, म्हणजे आम्हीं,
आमच्या पूर्वजांनीं, आमच्या राजांनीं व आमच्या सर-
दारांनीं यहूदाच्या नगरांत व यरुशलेमाच्या आळ्यांत
जसें केलें त्याप्रमाणें आकाशराणीस धूप जाळण्याविषयीं व
तिला पेयार्पणें अर्पिण्याविषयीं आमच्या तोंडून निघालेला
प्रत्येक शब्द आम्ही खरा करून दाखवूं; कारण
त्या काळीं आम्हांस अन्नाची चंगळ असे, आमची
आबादानी असे व आम्ही कांहीं अनिष्ट पाहत नसूं;
१८ पण आम्हीं आकाशराणीला धूप जाळण्याचें व तिला
पेयार्पणें करण्याचें बंद केलें तेव्हांपासून आम्हांला सर्व
गोष्टींची वाण पडली, आणि तरवारीनें व दुष्काळानें
आमचा नायनाट होत चालला आहे. १९ आम्ही
स्त्रिया आकाशराणीस धूप जाळीत होतों व तिला पेया-
र्पणें करीत होतों तेव्हां तिच्या[1] प्रतिमेच्या पोळ्या करून
तिला पेयार्पणें करीत होतों; तें आमच्या नवऱ्यांच्या
मतावांचून करीत होतों काय ? २० मग ज्या
पुरुषांनीं, स्त्रियांनीं व लोकांनीं यिर्मयाला हें उत्तर दिलें
त्या सर्वांस तो म्हणाला, २१ तुम्ही व तुमचे पूर्वज, तुमचे
राजे व तुमचे सरदार आणि देशांतील लोक या
सर्वांनीं यहूदाच्या नगरांत व यरुशलेमाच्या आळ्यांत
धूप जाळिला त्याचें परमेश्वराला स्मरण नाहीं का झालें ?
त्याच्या लक्षांत तें नाहीं का आलें ? २२ तुमच्या
कर्मांचा दुष्टपणा व तुम्हीं केलेलीं घोर कर्में हीं परमेश्वराला
इतःपर सहन होईनात; म्हणूनच तुमचा देश ओसाड,
वैराण, शापग्रस्त व निर्जन झाला आहे, हें आज
दिसतच आहे. २३ तुम्हीं धूप जाळिला, परमेश्वराविरुद्ध
पाप केलें, परमेश्वराची वाणी ऐकली नाहीं, त्याचें
धर्मशास्त्र, त्याचे विधि व त्याचे निर्बंध यांनीं तुम्ही
चालला नाहीं; म्हणून तुम्हांवर हें अरिष्ट आलें आहे
हें आज दिसतच आहे.

२४ यिर्मया त्या सर्व लोकांस व सर्व स्त्रियांस

१ **अथवा :** तिच्या पूजेसाठीं पोळ्या

म्हणालां, यहूदांतले जे तुम्ही सगळे लोक मिसर देशांत
आहां ते तुम्ही परमेश्वराचें वचन ऐका. २५ सेनाधीश
परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, तुम्हीं व तुमच्या
स्त्रियांनीं आपल्या तोंडांनीं तें बोलून हातांनीं सिद्धीसहि
नेलें आहे. तुम्ही म्हणालां, आकाशराणीस धूप
जाळण्याचे व तिला पेयार्पणें अर्पिण्याचे आम्हीं केलेले
नवस फेडूंच, तर तुम्ही आपले नवस कराच व फेडाहि.
२६ तरी पण यहूदांतले जे सर्व तुम्ही मिसर देशांत
राहत आहां ते तुम्ही परमेश्वराचें वचन ऐका: परमेश्वर
म्हणतो, पाहा, मीं आपल्या थोर नामाची शपथ वाहिली
आहे कीं अखिल मिसर देशांत, परमेश्वराच्या जीविता-
ची शपथ, असें म्हणावयास माझें नाम यहूदांतल्या
माणसांपैकीं कोणाच्या मुखांतून निघणारच नाहीं.
२७ पाहा, त्यांचें अभीष्ट नव्हे तर अनिष्ट व्हावें
म्हणून मीं त्यांच्यावर नजर ठेवीन; आणि मिसर देशांत
असलेल्या यहूदांतल्या सर्व लोकांचा दुष्काळानें
क्षय होत जाऊन शेवटीं ते अंत पावतील. २८ तरवारी-
पासून निभावलेले असे अगदीं थोडे लोक मिसर
देशांतून यहूदा देशांत परत जातील; आणि जे
यहूदाचे सर्व अवशिष्ट लोक मिसर देशांत कांहीं दिवस
राहण्यास गेले आहेत त्यांना, माझा शब्द खरा ठरतो
कीं त्यांचा खरा ठरतो, हें कळून येईल. २९ परमेश्वर
म्हणतो, माझीं वचनें तुमच्या अनिष्टाचीं ठरतील हें
तुम्हांस कळून यावें म्हणून मी या ठिकाणीं तुम्हांस
शिक्षा करीन, हेंच तुम्हांस चिन्ह होय. ३० परमेश्वर
म्हणतो, पाहा, यहूदाचा राजा सिद्कीया याचा वैरी
जो बाबेलाचा राजा नबुखद्रेस्सर तो त्याचा घात करण्यास
पाहत होता, त्याच्या हातीं मीं त्याला दिलें त्याप्रमाणें
मिसरी राजा, फारो हफ्रा यास मी त्याच्या वैऱ्यांच्या
व त्याचा घात करूं पाहणाऱ्यांच्या हातीं देईन.

४५ १ यहूदाचा राजा योशीयाचा पुत्र यहोया-
कीम याच्या कारकीर्दीच्या चौथ्या वर्षी बारूख
बिन नेरीया यानें यिर्मयाच्या तोंडचीं हीं वचनें
पुस्तकांत लिहिलीं तेव्हां त्यास यिर्मया संदेष्टा हें वचन
बोलला: २ हे बारूखा, परमेश्वर, इस्राएलाचा देव
तुला असें म्हणतो: ३ तूं म्हणालास, हाय हाय !
परमेश्वरानें माझ्या क्लेशांत दुःखाची भर घातली आहे,
मी कण्हून कण्हून थकलों आहें, मला कांहीं चैन पडत
नाहीं. ४ यास्तव त्याला सांग, परमेश्वर म्हणतो, पाहा,
मीं जें उभारिलें तें मोडून टाकीन, मीं जें लाविलें तें
उपटून टाकीन; सर्व पृथ्वीची हीच वाट. ५ तूं आपणा-
साठीं मोठाल्या गोष्टींची वांच्छा करितोस काय ? ती
करूं नको; पाहा, मी सर्व मानवांवर अरिष्ट आणीन,
असें परमेश्वर म्हणतो; पण जेथें जेथें तूं जाशील तेथें
तेथें तूं जिवानिशीं सुटशील.

४६ १ परमेश्वराचें राष्ट्रांविषयीं जें वचन यिर्मया
संदेष्ट्यास प्राप्त झालें तें हें:
२ मिसराविषयीं; मिसर देशाचा राजा फारो
नखो याचें सैन्य कर्कमीशाजवळ फरात नदाच्या काठीं
होतें; यहूदाचा राजा योशीयाचा पुत्र यहोयाकीम
याच्या कारकीर्दीच्या चौथ्या वर्षी बाबेलचा राजा नबु-
खद्रेस्सर यानें त्या सैन्याचा निःपात केला त्याविषयीं:
३ ढाल व कवच सिद्ध करा, युद्धास उभे राहा;
४ रथांस घोडे जुंपा; घोड्यावर स्वार व्हा; शिरस्त्राण
घालून उभे राहा; भाले घासून साफ करा; चिलखत
घाला. ५ माझ्या दृष्टीस हें कां पडत आहे ? ते दहशत
बसली म्हणून मागें फिरले आहेत, त्यांचे वीर पराभूत
झाले आहेत, ते पळ काढीत आहेत, मागें पाहत नाहींत;
चोहोंकडे भीतिच भीति आहे, असें परमेश्वर म्हण-
तो. ६ चपळांस पळून जातां येणार नाहीं, वीरांस निस-
टून जातां येणार नाहीं; उत्तर दिशेस फरात नदाच्या तीरीं
ते ठोकर खाऊन पडत आहेत. ७ नील नदीप्रमाणें
हा कोण चढून येत आहे ? त्याचें जल नद्यांप्रमाणें
उसळत आहे. ८ नील नदीप्रमाणें मिसर उसळत
आहे; त्याचें जल नद्यांप्रमाणें उसळत आहे; तो म्हणतो,
मी चढाई करून जाईन, मी पृथ्वी व्यापून टाकीन; मी
नगराचा व त्यांतील रहिवाश्यांचा नाश करीन. ९ अश्वां-
नो, दौड करा; रथांनो, भरधाव चाला; वीरहो, पुढें

चाला; ढालाईत कूश व फूट, धनुर्धारी धनुष्य वाकवि-
णारे लूदी हे तुम्ही सर्व चालूं लागा. १० तो दिवस
प्रभु, सेनाधीश परमेश्वर याचा आहे, आपल्या शत्रूंवर
सूड उगविण्याचा तो दिवस आहे; तरवार खाऊन तृप्त
होईल, ती त्यांचें रक्त पोटभर पिईल; कारण प्रभु,
सेनाधीश परमेश्वर यानें उत्तर देशीं फरात नदाच्या
तीरीं यज्ञ मांडिला आहे. ११ हे कुमारिके, मिसरकन्ये,
चढून गिलादास जा, तेथें मलम घे; तूं औषधोपचारांची
व्यर्थ गर्दी केली आहे; तुझ्या घायाला मलमपट्टी
नाहीं. १२ राष्ट्रांनीं तुझी अपकीर्ति ऐकली आहे,
तुझ्या आक्रोशानें पृथ्वी भरली आहे; कारण वीराला
वीर टक्कर देऊन एकत्र पडत आहेत.

१३ बाबेलचा राजा नबुखद्रेस्सर येऊन मिसर
देशावर मारा करील, त्याविषयीं यिर्मया संदेष्ट्याला
परमेश्वराचें वचन प्राप्त झालें तें हें:

१४ हें मिसर देशांत विदित करा, मिग्दोलांत
जाहीर करा; नोफ व तहपन्हेस यांत जाहीर करा;
म्हणा, उभा राहा, सज्ज हो; कारण तुझ्याभोवतालचें
सर्व कांहीं तरवारीनें खाऊन टाकिलें आहे. १५ तुझ्या
बलिष्ठांचा कां निःपात झाला आहे? त्यांस उभें राहवलें
नाहीं कारण परमेश्वरानें त्यांस ढकलून दिलें. १६ पर-
मेश्वरानें पुष्कळांस ठेचा खावयास लाविलें; ते एकावर
एक पडले; ते म्हणाले, उठा, आपण या पीडणाऱ्या
तरवारीपासून निभावून आपल्या लोकांकडे परत जाऊं;
आपल्या मातृभूमीस जाऊं. १७ ते तेथें ओरडले कीं
मिसर देशाचा राजा फारो म्हणजे पोकळ गर्जनाच
होय; नेमलेली वेळ त्यानें दवडिली. १८ राजेश्वर,
सेनाधीश परमेश्वर, हें ज्याचें नाम तो म्हणतो, माझ्या
जीविताची शपथ, डोंगरांमध्यें जसा ताबोर व समुद्रा-
जवळ जसा कर्मेल तसा तो निश्चयें येईल. १९ मिसर-
निवासिनी कन्ये, देशपार जाण्यासाठीं सामग्री तयार
कर; कारण नोफ उजाड होईल, जळून निर्जन होईल.
२० मिसर ही फार सुंदर तरुण कालवड आहे; पण
उत्तरेहून एक गांधीलमाशी आली आहे हो आली
आहे! २१ तिचे भाडोत्री शिपाईहि तिच्यामध्यें लठ्ठ
वासरांसारखे आहेत; ते आपली पाठ फिरवून
सगळेच पळून जातात; ते तोंड देत नाहींत, कारण
त्यांच्या नाशाचा दिवस, त्यांच्या पारिपत्याचा समय
त्यांच्यावर आला आहे. २२ सर्प सरसर चालतो तसा
तिचा आवाज होतो; ते सैन्यासह येतात; लाकूडतोड्यां-
प्रमाणें ते तिजवर कुऱ्हाडी घेऊन येतात. २३ पर-
मेश्वर म्हणतो, ते तिचें वन तोडीत आहेत, त्या
सैन्यांचा अंजमास करितां येत नाहीं; ते टोळांहून
असंख्य आहेत, ते अगणित आहेत. २४ मिसरकन्येची
अब्रू गेली आहे; तिला उत्तरेच्या लोकांच्या हातीं दिलें
आहे. २५ सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव म्हणतो,
पाहा, नो एथला आमोन, फारो, मिसर व त्याचीं दैवतें
आणि राजे, फारो व त्याजवर भिस्त ठेवणारे यांचा
मी समाचार घेईन; २६ त्यांचा घात करूं पाहणारे,
बाबेलचा राजा नबुखद्रेस्सर व त्याचे सेवक यांच्या
हातीं मी त्यांना देईन; तरी पुढें त्यांत पूर्वकालाप्रमाणें
पुनः वस्ती होईल असें परमेश्वर म्हणतो, २७ हे
माझ्या सेवका याकोबा, तूं भिऊं नको; हे इस्रा-
एला, कच खाऊं नको; पाहा, मी तुला दूर देशांतून
बचावून आणीन, तुझ्या संततीस बंदिवासांतून
मुक्त करीन; याकोब परत येईल, तो निर्भयपणें
विश्रांति पावेल, त्यास कोणी धाक घालणार नाहीं.
२८ परमेश्वर म्हणतो, माझ्या सेवका याकोबा, तूं भिऊं
नको; कारण मी तुजबरोबर आहें; ज्या राष्ट्रांत
मीं तुला हाकून दिलें आहे, त्या सर्वांचा मी सर्वस्वीं
नाश करीन, पण तुझा सर्वस्वीं नाश करणार नाहीं;
तरी मी तुझें योग्य शासन करीन, तुला शिक्षा केल्या-
वांचून सोडणार नाहीं.

४७
१ फारोनें गज्जावर मारा केला त्यापूर्वीं
पलिष्ट्यांविषयीं परमेश्वराचें वचन यिर्मयाला
प्राप्त झालें तें हें:

२ परमेश्वर म्हणतो, पाहा, उत्तरेकडून पाणी चढत
आहे, त्याचा मोठा लोंढा होत आहे; देश व त्यांतील
सर्व कांहीं, नगर व त्यांतले रहिवासी या सर्वांस तो

मुकेील; लोक आक्रोश करितील, देशांतले सर्व रहि-
वासी हायहाय करितील. ३ त्याच्या घोड्यांच्या खुरांच्या
टापांमुळें, त्याच्या रथांच्या नादामुळें, व त्याच्या
चाकांच्या घडघडाटानें वडिलांचे हात गळाल्यामुळें ते
मागें वळून आपल्या मुलांकडे सुद्धां पाहावयाचे
नाहींत. ४ पलिष्टयांच्या नाशाचा दिवस येत
आहे; सोर व सीदोन यांला साहाय्य करणारा जो
कोणी उरला असेल त्याचा उच्छेद होईल; परमेश्वर
पलिष्टयांचा म्हणजे कफतोर द्वीपांतील अवशिष्ट लोकांचा
नाश करणार आहे. ५ गज्जाचें वपन झालें आहे;
त्यांच्या खोऱ्यांतलें उरलेलें अष्कलोन नष्ट झालें आहे;
तूं कोठवर आपणास जखमा करून घेशील ? ६ हे पर-
मेश्वराच्या तरवारी, तूं केव्हां स्वस्थ राहणार ? तूं परत
आपल्या म्यानांत जा, विराम पाव; स्वस्थ राहा. ७ पर-
मेश्वरानें तिला आज्ञा केली आहे, तर ती कशी स्वस्थ
राहील ? अष्कलोन व समुद्रकिनारा यांवर तिला त्यानें
नेमिलें आहे.

४८ १ मवाबाविषयीं : सेनाधीश परमेश्वर,
इस्राएलाचा देव म्हणतो, अरेरे ! बिचारें
नबो; तें ओसाड झालें आहे; किर्याथाईमाची
फजिती झाली आहे, तें हस्तगत झालें आहे;
मिस्गाबाची फजिती होऊन तें भंगलें आहे.
२ मवाबकन्येची कीर्ति नाहींशी झाली आहे;
हेशबोनांत तिजविरुद्ध कट करीत आहेत; ते
म्हणतात, चला, आपण तिचें राष्ट्रत्व मोडून टाकूं. हे
मदमेना, तूं सामसूम होशील; तुझ्यामागें तरवार
लागेल. ३ होरोनाईमाकडून जुलूम ! प्रचंड नाश ! अशी
आरोळी ऐकूं येत आहे. ४ मवाबाचा नाश झाला आहे;
त्याच्या हीनदीन झालेल्या लोकांची आरोळी ऐकूं येत
आहे. ५ ते रडत रडत लूहीथाचा चढाव चढत आहेत;
होरोनाईमाच्या उतारावर नाश ! नाश ! अशी संकटाची
आरोळी ऐकूं येत आहे. ६ पळा, आपला जीव वांचवा,
वनांतल्या झुडुपासारखे व्हा. ७ तुझीं कर्मे व तुझे निधि
यांवर तुझी भिस्त होती म्हणून तूं हस्तगत होशील;
कमोश आपले याजक व सरदार यांसह बंदिवान होऊन
जाईल. ८ प्रत्येक नगरावर लुटारू येईल; कोणतेंहि
नगर निभावणार नाहीं; खोरें नाश पावेल; पठार
उद्ध्वस्त होईल असें परमेश्वर बोलला आहे. ९ मवाबास
पंख द्या म्हणजे तो उडून निघून जाईल; त्याचीं नगरें
उजाड होतील, त्यांत कोणी राहावयाचा नाहीं.
१० जो परमेश्वराच्या कार्याची हयगय करितो तो
शापित होवो; जो रक्तपातापासून आपली तरवार
राखितो तो शापित होवो. ११ मवाब लहानपणापासून
सुखांत आहे, स्थिर राहिल्यामुळें गाळ खालीं बसलेल्या
द्राक्षारसासारखा तो आहे; त्याला या पात्रांतून त्या पात्रांत
ओतिलें नाहीं, तो बंदिवान होऊन गेला नाहीं, म्हणून
त्याची रुचि तशीच कायम आहे; त्याच्या वासांत
कांहीं फरक झालेला नाहीं. १२ ह्यामुळें परमेश्वर
म्हणतो, पाहा, असे दिवस येत आहेत कीं द्राक्षारस-
पात्राची उलथापालथ करणाऱ्यांस मी त्याच्याकडे
पाठवीन, ते त्याची उलथापालथ करितील; ते त्याचीं
पात्रें रिकामीं करितील, त्याच्या घागरी फोडून टाकि-
तील. १३ आपल्या भरवशाचा विषय जें बेथेल
त्याच्यासंबंधानें इस्राएल फजीत झाला तसा मवाब
कमोशासंबंधानें फजीत होईल. १४ आम्ही वीर आहों,
युद्धाच्या कामीं शूर आहों, असें तुम्ही कां म्हणतां ?
१५ मवाब ओसाड झाला आहे, त्याच्या नगरांवर
लोक चढाई करून गेले आहेत, त्याचे निवडक
तरुण वध पावण्यास खालीं उतरून गेले आहेत, असें
राजेश्वर म्हणतो; त्याचें नाम सेनाधीश परमेश्वर.
१६ मवाबावर अरिष्ट येऊन ठेपलें आहे, त्याची विपत्ति
त्वरा करीत आहे. १७ त्याच्या आसपास असणारे व
त्याचें नांव जाणणारे तुम्ही सर्व त्याच्यासाठीं शोक करा;
म्हणा, मजबूत वेत्र, वैभवी दंड कसा मोडिला आहे !
१८ दीबोननिवासी कन्ये, आपल्या वैभवापासून खालीं
उतर, रुक्ष भूमीवर बैस; कारण मवाबाचा विध्वंस कर-
णारा तुझ्यावर चाल करून आला आहे, त्यानें तुझ्या
दुर्गांचा विध्वंस केला आहे. १९ अरोएराच्या रहिवा-
सिनी, रस्त्यावर उभी राहून पाहा; पळून जाणाऱ्यास व

निभावलेलीस विचार कीं काय झालें आहे? २० मवाब फजीत झाला; हायहाय करा, रडा; मवाब ओसाड झाला आहे हें आर्णोनांत सांगा. २१ सपाट प्रदेशाला शासन झालें आहे; होलोन, याहस, मेफाथ, २२ दीबोन नबो, बेथ-दिबलथाईम, २३ किर्याथाईम, बेथ-गामूल, बेथ-मौन, २४ करीयोथ, बस्रा, आणि मवाब देशांतलीं दूरचीं व जवळचीं नगरें यांस शासन झालें आहे. २५ परमेश्वर म्हणतो, मवाबाचें शृंग मोडिलें आहे, त्याचा हात मोडिला आहे. २६ त्याला बेहोश करा, कारण त्यानें परमेश्वराविरुद्ध बढाई मारिली आहे; मवाब आपल्या वांतींत लोळेल, तो हास्यविषय होईल. २७ इस्राएल तुझा हास्यविषय नव्हता का? तो चोरांमध्यें आढळला काय? जेव्हांजेव्हां तूं त्याची गोष्ट काढावीस तेव्हांतेव्हां तूं आपली मान हालवावीस. २८ मवाबाच्या रहिवाश्यांनो, नगरें सोडून द्या व कड्यांतून वस्ती करा; कपारीच्या बाजूला कोटें करणाऱ्या पारव्यासारखे व्हा. २९ आम्ही मवाबाचा गर्व ऐकून आहों, तो अति गर्विष्ठ आहे; त्याचा ताठा, त्याचा अहंकार, त्याचा अभिमान, त्याची उन्मत्तता आम्ही ऐकून आहों. ३० परमेश्वर म्हणतो, त्याचा क्रोध, त्याची पोकळ बढाई, मला ठाऊक आहे; ती व्यर्थ ठरली आहे. ३१ यामुळें मी मवाबाविषयीं हाय हाय करीन; अवघ्या मवाबासाठीं आक्रंदन करीन; कीर-हरेसच्या लोकांसाठीं शोक करितील. ३२ हे सिब्मेच्या द्राक्षलते, तुजसाठीं याजेरच्या आक्रोशाहून अधिक आक्रोश करीन; तुझ्या खांद्या समुद्रापलीकडे गेल्या होत्या, याजेर सरोवरापर्यंत त्या पोहंचल्या होत्या; तुझ्या ग्रीष्मऋतूंतील फळांवर व द्राक्षांच्या हंगामावर लुटारू पडला आहे. ३३ फळबागेंतून, मवाब देशांतून आनंद व हर्ष नाहींसा केलेला आहे; द्राक्षकुंडांत द्राक्षारस नाहीं असें मीं केलें आहे; हर्षनाद करून द्राक्षें कोणी तुडविणार नाहीं; हर्षनाद होईल तो द्राक्षें तुडविणाऱ्यांचा नसणार. ३४ हेशबोनाहून एलालेपर्यंत, याहसापर्यंत आरोळी होते, सोअरापासून होरोनाईमापर्यंत, एग्लाथ-शलिशीयापर्यंत आरोळी होते; कारण निम्रीमाचें पाणी आटलें आहे. ३५ परमेश्वर म्हणतो, तसेंच मवाबांतून उच्चस्थानीं अर्पण वाहणारा, व आपल्या दैवतांस धूप दाखविणारा नाहींसा होईल असें मी करीन. ३६ यामुळें मवाबासाठीं माझें हृदय वायुवाद्यांसारखें नाद करीत आहे, कीर-हरेसच्या लोकांसाठीं माझें हृदय वायुवाद्यांसारखें नाद करीत आहे; त्यानें संपादिलेलें विपुल धन लयास गेलें आहे. ३७ प्रत्येक डोकें भादरलें आहे; प्रत्येक दाढी मुंडली आहे; सर्वांच्या हातांवर घाय आहेत, कमरांला गोणताट आहे. ३८ मवाबाच्या सर्व धाब्यांवर, त्याच्या सर्व चवाठ्यांवर चोहोंकडे शोक चालू आहे; कारण नापसंत पात्राप्रमाणें मीं मवाबाचा फोडून चुरा केला आहे, असें परमेश्वर म्हणतो. ३९ तो कसा भंगला आहे! ते कसे हायहाय करीत आहेत! मवाबानें लाजून कशी आपली पाठ फिरविली आहे! मवाब आपल्या सर्व शेजाऱ्यापाजाऱ्यांस हास्य व विस्मय यांचा विषय झाला आहे! ४० परमेश्वर म्हणतो, पाहा, तो गरुडासारखा उडेल व मवाबावर आपले पंख पसरील. ४१ करीयोथ हस्तगत झालें आहे, त्याचे दुर्ग सर केले आहेत; त्या दिवशीं मवाबाच्या वीरांचें मन वेणा देणाऱ्या स्त्रीच्या मनासारखें होईल. ४२ मवाब नाश पावून राष्ट्ररूप राहणार नाहीं, कारण त्यानें परमेश्वराविरुद्ध बढाई मारिली आहे. ४३ हे मवाबनिवासी, भीति, गर्ता व पाश हीं तुला प्राप्त झालीं आहेत असें परमेश्वर म्हणतो. ४४ जो भीतीपासून निभावेल तो गर्तेंत पडेल, जो गर्तेंतून बाहेर येईल तो पाशांत अडकेल; कारण मी त्याजवर म्हणजे मवाबावर समाचार घेण्याचें वर्ष आणीत आहें, असें परमेश्वर म्हणतो. ४५ पळून जाणारे हेशबोनाच्या छायेंत निर्बळ होऊन राहत आहेत; कारण हेशबोनांतून अग्नि, सीहोनांतून ज्वाला निघून मवाबाच्या सीमा, व दंगेखोरांचीं माथीं खाऊन टाकीत आहे. ४६ हे मवाबा, तूं हायहाय करणार! कमोशाचे लोक नष्ट झाले आहेत! कारण तुझे पुत्र बंदिवान करून नेले आहेत, तुझ्या कन्या बंदिवान करून नेल्या आहेत, ४७ तरी पुढील काळीं मी मवाबाचा बंदिवास उलटवीन, असें परमेश्वर म्हणतो. येथें

मवाबाच्या शासनाचें कथन संपलें.

१ अम्मोनी लोकांविषयीं: परमेश्वर म्हणतो,
४९ काय? इस्राएलास कोणी पुत्र, कोणी वारस
नाहीं काय? तर मिल्कोम दैवतानें गाद कां
घेतलें?[1] त्याचे लोक गादाच्या नगरांतून कां वस्ती
करून आहेत? २ यास्तव परमेश्वर म्हणतो, पाहा, असे
दिवस येत आहेत कीं त्यांत अम्मोन्यांच्या राब्बा नगरा-
विरुद्ध मी रणशब्द ऐकावयास लावीन; तें नासाडीचा
ढिगार होईल, तिच्या कन्यांस अग्नीनें जाळितील;
इस्राएल आपले वारस झालेल्यांचा वारस होईल, असें
परमेश्वर म्हणतो. ३ हे हेशबोना, हायहाय कर!
कारण आय उजाड केलेलें आहे; राब्बाच्या कन्यांनो,
रडा! आपल्या अंगाला गोणताट गुंडाळा; शोक करा,
आवारांतून इकडून तिकडे धावा; कारण मिल्कोम दैवत,
त्याचे याजक व सरदार यांसह, बंदिवान होऊन जाईल.
४ तूं खोऱ्यांचा, आपल्या सुपीक खोऱ्यांचा कां अभि-
मान बाळगितेस? अगे मला सोडून जाणारे कन्ये, तूं
आपल्या निधींवर भिस्त ठेवून म्हणालीस, मजवर कोण
चालून येणार? ५ प्रभु सेनाधीश परमेश्वर म्हणतो,
पाहा, तुझ्या आसपास जे कोणी आहेत त्यांच्यांतून
मी तुजवर दहशत आणितों; तुम्हांतील एकुणएकास
हाकून लावितील, भटकणाऱ्यांस एकत्र करावयास कोणी
राहावयाचा नाहीं. ६ तरी पुढें मी अम्मोन्यांचा बंदि-
वास उलटवीन, असें परमेश्वर म्हणतो.

७ अदोमाविषयीं: सेनाधीश परमेश्वर म्हणतो,
तेमानांत आतां शहाणपण उरलें नाहीं ना? समंजसांचें
शहाणपण लयास गेलें ना? त्यांचें सर्व शहाणपण
संपलें ना? ८ ददानच्या रहिवाश्यांनो, पळा, फिरा,
दडून राहा; त्याचा समाचार घेण्याची वेळ आली
म्हणजे मी एसावावर नेमिलेलें अरिष्ट त्याजवर
आणीन. ९ द्राक्षें गोळा करणारे तुजकडे आले म्हणजे
ते कांहीं सरवा राहूं देणार नाहींत; रात्रीं चोर आले
तर त्यांस हवें तितकें मिळे तोंवर ते नासधूस करितील.
१० तसें मीं एसावास उघडेंबोडकें केलें आहे, मीं
त्याचीं गुप्तस्थानें उघडीं केलीं आहेत, त्याला लपतां
येत नाहीं; त्याचा वंश, त्याचे भाऊबंद व त्याचे
शेजारी नष्ट झाले आहेत, तो गत झाला आहे.
११ तुझे अनाथ राहूं दे; मी त्यांस जीवंत ठेवीन;
तुझ्या विधवा मजवर भरवसा ठेवोत. १२ कारण
परमेश्वर म्हणतो, पाहा, न्यायानें पाहतां ज्यांस पेला
प्यावयाचा नव्हता त्यांस तो प्यावा लागेल; तर तूं
कोणतीहि शिक्षा झाल्यावांचून राहशील काय? तूं
शिक्षा झाल्यावांचून राहणार नाहींस, तुला पेला
प्यावाच लागेल. १३ परमेश्वर म्हणतो, मीं आपल्या
जीविताची शपथ वाहिली आहे कीं बस्रा विस्मय,
निंदा, उजाडी व शाप यांस पात्र होईल; त्याचीं सर्व
नगरें कायमचीं ओसाड होतील. १४ मीं परमेश्वरा-
कडून वर्तमान ऐकलें आहे; राष्ट्रांत जासूद पाठविला
आहे; तुम्ही सर्व एकवट व्हा, तिजवर चढाई करा,
युद्धास उभे राहा! १५ कारण पाहा, मीं तुला राष्ट्रां-
मध्यें क्षुद्र केलें आहे, मानवांमध्यें तुला तुच्छ केलें
आहे. १६ जी तूं कड्याच्या कपारींत राहतेस,
टेकडीच्या माथ्याचा आश्रय करून बसतेस, त्या तुला
तुझ्या विक्राळपणानें, तुझ्या मनाच्या गर्वानें फसविलें
आहे; तूं आपलें कोटें गरुडाप्रमाणें उंच ठिकाणीं केलें
असलें तरी तेथून मी तुला खालीं आणीन, असें
परमेश्वर म्हणतो. १७ अदोम विस्मयास पात्र होईल;
प्रत्येक येणाराजाणारा तिला पाहून विस्मय पावेल,
तिच्या सर्व पीडा पाहून तिचा उपहास करील.
१८ परमेश्वर म्हणतो, सदोम व गमोरा व त्यांजवळचे
गांव जसे उद्ध्वस्त झाले त्याप्रमाणें तेथें कोणी राहाव-
याचा नाहीं; एकहि मनुष्य तेथें बिऱ्हाड करणार नाहीं,
असें परमेश्वर म्हणतो. १९ पाहा, तो यार्देनेच्या घोर
अरण्यामधून येणाऱ्या सिंहाप्रमाणें त्या मजबूत वस्ती-
वर येईल; मी अदोमास त्या वस्तीपासून एका क्षणांत
पळवीन, व ज्याला निवडतील त्यास तिजवर नेमीन;
कारण मजसमान कोण आहे? मला न्यायसभेसमोर

[1] अथवा: त्यांच्या राजानें

कोण आणील ? कोणता मेंढपाळ मजसमोर उभा
राहील ? २० ह्यास्तव परमेश्वरानें अदोमाविरुद्ध केलेला
संकल्प व तेमानाच्या रहिवाश्यांविषयीं केलेल्या योजना
ऐका: ते त्यांस, कळपांतील लहानसहानांस, निश्चयें नेतील;
त्यांची वस्ती त्यांच्यामुळें खात्रीनें विस्मय पावेल.
२१ त्यांच्या पतनाच्या आवाजानें पृथ्वी कांपत आहे;
आरोळी होत आहे, तिचा आवाज तांबड्या समुद्रांत
ऐकूं येत आहे. २२ पाहा, तो गरुडासारखा येऊन
झडप घालील, तो बस्रावर आपले पंख पसरील; त्या
दिवशीं अदोमाच्या वीरांचें मन वेणा देणाऱ्या स्त्रीच्या-
प्रमाणें होईल.

२३ दिमिष्काविषयीं: हमाथ व अर्पाद फजीत
झाले आहेत; त्यांनीं वाईट वर्तमान ऐकलें आहे, त्यांच्या
काळजाचें पाणी पाणी झालें आहे; समुद्र क्षुब्ध झाला
आहे; तो शांत होऊं शकत नाहीं. २४ दिमिष्क
नगरीचा धीर सुटला आहे; ती पळून जाण्यास तयार
झाली आहे; दहशतीनें तिला पछाडिलें आहे; प्रसूत
होणाऱ्या स्त्रीप्रमाणें क्लेश व वेदना तिला लागल्या
आहेत. २५ प्रशंसनीय नगरी, माझ्या आवडीची नगरी
लोक कां सोडून गेले नाहींत ? २६ ह्यामुळें त्या दिवशीं
तिचे तरुण तिच्या चवाठ्यांवर पडतील, सर्व वीर
स्तब्ध होतील असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो. २७ मी
दिमिष्क नगरीच्या तटांत अग्नि पेटवीन, तो बेन-हदादाचे
वाडे खाऊन टाकील.

२८ केदार व हासोराचीं संस्थानें यांवर बाबेलाचा
राजा नबुखद्नेस्सर यानें मारा केला त्याविषयीं:

परमेश्वर म्हणतो, उठा, केदारावर चढाई करा;
पूर्वेच्या लोकांचा नाश करा. २९ ते त्यांचे तंबू व कळप
नेतील; त्यांच्या कनाती, त्यांचीं सर्व पात्रें, व त्यांचे
उंट ते आपल्यासाठीं घेऊन जातील; चोहोंकडे दहशत
आहे असें ते त्यांस सांगतील. ३० हासोराच्या रहि-
वाश्यांनो, पळा ! दूर भटका, दडून राहा असें परमेश्वर
म्हणतो; कारण बाबेलाचा राजा नबुखद्नेस्सर यानें
तुमच्याविरुद्ध संकल्प केला आहे, तुमच्याविरुद्ध त्यानें
योजना केली आहे. ३१ उठा ! स्वस्थ व बेफिकीर
राहणाऱ्या राष्ट्रांवर चढाई करा असें परमेश्वर म्हणतो;
त्याला वेशी किंवा अडसर नाहींत, ते एकीकडे
राहतात. ३२ त्यांचे उंट लुटले जातील, त्यांचे बहुत
कळप लुटीस जातील; दाढीचे कोपरे छाटलेल्यांची
दाही दिशांत मी दाणादाण करीन; व चोहोंकडून
त्यांच्यावर अरिष्ट आणीन, असें परमेश्वर म्हणतो.
३३ हासोर हें कोल्ह्यांचें वसतिस्थान होईल, कायमचें
ओसाड होईल; तेथें कोणी राहावयाचा नाहीं,
एकहि मनुष्य तेथें बिऱ्हाड करणार नाहीं.

३४ यहूदाचा राजा सिद्कीया याच्या राज्याच्या
आरंभीं एलामाविषयीं यिर्मया संदेष्ट्यास परमेश्वराचें
वचन प्राप्त झालें तें हें: ३५ सेनाधीश परमेश्वर
म्हणतो, पाहा, त्यांच्या बळाचा मुख्य आधार जें
एलामाचें धनुष्य तें मी मोडून टाकीन. ३६ एलामावर
आकाशाच्या चारहि भागांतून मी चार वारे सोडीन व
त्यांस त्या चारहि दिशांस विखरीन; ज्यांत एलामाचे
पांगलेले लोक गेले नाहींत असें एकहि राष्ट्र सांपडा-
वयाचें नाहीं. ३७ एलामाचा घात करूं पाहणाऱ्या
त्यांच्या शत्रूंपुढें मी त्यांस घाबरे करीन; मी
त्यांजवर अरिष्ट, माझा संतप्त क्रोध आणीन असें परमेश्वर
म्हणतो; मी त्यांस नष्ट करीपर्यंत तरवार त्यांच्या
पाठीस लावीन. ३८ मी एलामांत आपलें सिंहासन
मांडीन, आणि तेथून राजा व सरदार यांचा नाश
करीन असें परमेश्वर म्हणतो. ३९ तरी पुढील काळीं मी
एलामाचा बंदिवास उलटवीन असें परमेश्वर म्हणतो.

१ बाबेलाविषयीं, खास्द्यांच्या देशाविषयीं
५० परमेश्वर जें वचन यिर्मया संदेष्ट्याच्या द्वारें
बोलला तें हें:
२ राष्ट्रांमध्यें हें विदित करा, प्रसिद्ध करा, ध्वज
उभारा; प्रसिद्ध करा, छपवून ठेवूं नका; म्हणा, बाबेल
घेतला आहे, बेल फजीत झाला आहे, मरोदख भग्न

झाला आहे; त्याच्या मूर्तींची फजिती झाली आहे,
त्याचे पुतळे भग्न झाले आहेत. ३ कारण त्याच्यावर
उत्तरेकडून एक राष्ट्र चढाई करून आलें आहे; तें
त्याचा देश ओसाड करील, त्यांत एकहि रहिवासी
उरणार नाहीं; मनुष्यापासून पशूपर्यंत सर्व पळाले
आहेत, निघून गेले आहेत. ४ परमेश्वर म्हणतो, त्या
दिवसांत, त्या काळीं इस्राएल लोक येतील, ते व
यहूदाचे लोक जमून येतील; ते वाटेनें रडत येतील,
परमेश्वर आपला देव याला शरण येतील. ५ ते
सीयोनाची वाट विचारितील, आपलीं तोंडें इकडल्या
रस्त्याकडे करून म्हणतील; चला, शाश्वत व चिरस्मरणीय
अशा करारानें आपण परमेश्वराबरोबर मिलाफ करूं.

६ माझे लोक चुकार मेंढरांच्या कळपासारखे झाले
आहेत; त्यांच्या मेंढपाळांनीं त्यांस भ्रांत केलें आहे,
डोंगरांवर त्यांस बहकविलें आहे; ते पहाडांपहाडांतून
भटकले आहेत; ते आपलें विश्रांतिस्थान विसरले
आहेत. ७ ज्यांस ते सांपडले त्यांनीं त्या सर्वांस खाऊन
टाकिलें; त्यांचे शत्रु म्हणाले, याबद्दल आम्हांला कांहीं दोष
नाहीं, कारण परमेश्वर, जो न्यायाचें वसतिस्थान, जो
त्यांच्या पूर्वजांचा आशाकंद त्याच्याविरुद्ध त्यांनीं पातक
केलें आहे. ८ बाबेलांतून पळून जा, खास्द्यांच्या देशां-
तून निघून जा; कळपाच्या पुढें चालणाऱ्या एडक्यां-
सारखे व्हा. ९ कारण पाहा, मी उत्तर देशाहून मोठ्या
राष्ट्रांचा जमाव उठवून बाबेलावर आणीन; ते त्याच्या-
विरुद्ध सज्ज होतील; त्याच दिशेकडून तो हस्तगत होईल;
रिकामा परत येत नाहीं अशा चतुर वीराच्या बाणांप्रमाणें
त्यांचे बाण आहेत. १० ते खास्द्यांचा देश लुटतील;
त्याला लुटणारे सर्व तृप्त होतील असें परमेश्वर म्हणतो.
११ माझें वतन लुटणाऱ्यांनो, तुम्ही जरी हर्ष व उल्लास
करीत आहां, मळणी करणाऱ्या कालवडीप्रमाणें बाग-
डत आहां, मजबूत घोड्यांप्रमाणें खिंकाळत आहां,
१२ तरी तुमची माता अत्यंत ओशाळी होईल; तुमची
जन्मदात्री लाजेल; पाहा, तें अगदीं कनिष्ठ राष्ट्र, वैराण
जंगल व शुष्क भूमि होईल. १३ परमेश्वराच्या संतापा-
मुळें तें निर्जन होईल, तें अगदीं ओसाड होईल;
प्रत्येक येणाराजाणारा बाबेलाविषयीं विस्मित होईल,
व त्याच्या सर्व क्लेशांस्तव त्याचा उपहास करील.
१४ अहो सर्व धनुर्धाऱ्यांनो, बाबेलाच्यासभोवतीं युद्धास
उभे राहा; त्याला बाण मारा, एकहि बाण राखून ठेवूं
नका; कारण त्यानें परमेश्वराविरुद्ध पातक केलें आहे.
१५ त्याच्यावर चोहोंकडून रणघोष करा; त्यानें हार
खाल्ली आहे; त्याची तटबंदी पडली आहे; त्याचे कोट
पाडिले आहेत; कारण हा परमेश्वराकडून सूड आहे;
त्याच्यावर सूड उगवून घ्या; त्यानें केलें तसें त्याला
करा. १६ बाबेलांतला पेरणारा, कापणीच्या वेळीं विळा
चालविणारा नाहींसा करा; जोरदार तरवारीपुढें प्रत्येक
जण आपल्या लोकांकडे वळेल, प्रत्येक जण स्वदेशाकडे
धाव घेईल.

१७ इस्राएल भडकलेलें मेंढरूं आहे; सिंहांनीं
त्याला बुजविलें आहे; त्याला प्रथम खाणारा अश्शुराचा
राजा; शेवटीं त्याचीं हाडें मोडणारा बाबेलाचा राजा
नबुखद्रेस्सर. १८ याकरितां सेनाधीश परमेश्वर, इस्रा-
एलाचा देव म्हणतो, पाहा, मी अश्शुराच्या राजाचा
समाचार घेतला तसा बाबेलाच्या राजाचा व त्याच्या
देशाचा समाचार घेईन. १९ मी इस्राएलास त्याच्या
कुरणांत परत आणीन, तो कर्मेल व बाशान यांवर
चरेल, एफ्राइमाच्या डोंगरांवर व गिलादांत त्याचा जीव
तृप्त होईल. २० त्या दिवसांत, त्या काळीं, लोक इस्रा-
एलाचें दुष्कर्म धुंडितील पण तें नसावयाचें; यहूदाचीं
पातकें धुंडितील पण त्यांस तीं सांपडावयाचीं नाहींत;
कारण ज्यांस मी बचावून शेष ठेवीन त्यांस मी क्षमा
करीन असें परमेश्वर म्हणतो.

२१ मराथाईम ( अत्यंत बंडखोर देश ) यावर
चढाई कर, आणि पकोडच्या ( समाचार घ्यावयाच्या
देशाच्या ) रहिवाश्यांवर चढाई कर; त्यांची नासधूस
कर, त्यांच्या पाठीस लागून त्यांचा समूळ नाश कर,
असें परमेश्वर म्हणतो; मीं तुला आज्ञापिल्याप्रमाणें सर्व
कांहीं कर. २२ देशांत युद्धध्वनि होत आहे, मोठा
नाश होत आहे. २३ हा सर्व जगाचा हातोडा कसा
मोडूनतोडून टाकिला आहे ! बाबेल सर्व राष्ट्रांमध्यें

कसा ओसाड झाला आहे ! २४ हे बाबेला, मीं तुज-
साठीं सांपळा मांडिला व तूं सांपडला आहेस, पण तुला
कळलें नाहीं; तूं सांपडलास व तुला पकडिलेंहि, कारण
तूं परमेश्वराविरुद्ध भांडलास. २५ परमेश्वरानें आपलें
शस्त्रागार उघडिलें आहे, त्यांतून त्यानें आपल्या
क्रोधाचीं हत्यारें बाहेर काढलीं आहेत; कारण प्रभु,
सेनाधीश परमेश्वर यास खास्द्यांच्या देशीं कार्य कराव-
याचें आहे. २६ तुम्ही सर्व चोहोंकडून त्याजवर चढाई
करा; त्याचीं भांडारें उघडा; त्याचे ढीग करा; त्याचा
विध्वंस करा; त्याचें कांहीं शिल्लक राहूं देऊं नका.
२७ त्याचे सर्व वीर मारून टाका; त्यांस वधस्थलीं जाऊं
द्या; त्यांस धिक्कार असो ! कारण त्यांचा दिवस, त्यांच्या
समाचाराची वेळ आली आहे. २८ बाबेल देशांतून जे
पळून निभावून जात आहेत त्यांचा ध्वनि ऐका; तो ध्वनि
आमचा देव परमेश्वर याजकडून सूड, त्याच्या मंदिरा-
विषयींचा सूड, सीयोनास कळवीत आहे. २९ बाबेला-
वर तिरंदाज, सर्व धनुर्धारी यांस जमवा; त्याच्या सभों-
वतीं तळ द्या; त्याचा कांहीं निभाव लागूं देऊं नका;
त्याच्या कृतीप्रमाणें त्याला प्रतिफळ द्या; जें सर्व त्यानें
केलें तसें त्याला करा; कारण त्यानें परमेश्वराविरुद्ध,
इस्राएलाच्या पवित्र प्रभूविरुद्ध तोरा मिरविला आहे.
३० ह्यामुळें त्याचे तरुण त्याच्या चवाठ्यांवर पडतील,
त्याचे सर्व वीर त्या दिवशीं स्तब्ध होतील असें परमे-
श्वर म्हणतो. ३१ हे गर्विष्ठा ! पाहा, मीं तुजविरुद्ध आहें
असें प्रभु, सेनाधीश परमेश्वर म्हणतो, कारण तुझा
दिवस, मीं तुझा समाचार घेण्याची वेळ आली आहे.
३२ गर्विष्ठ ठोकर खाऊन पडेल, त्याला कोणी उचलणार
नाहीं; मी त्याच्या नगरांना आग लावून देईन, ती त्याच्या
भोवतालचें सर्व कांहीं खाऊन टाकील.

३३ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, इस्राएल लोक
व यहूदी लोक यांजवर बरोबरच जुलूम होत आहे;
ज्या सर्वांनीं त्यांस बंदिवान करून नेलें त्यांनीं त्यांस
धरून ठेविलें; ते त्यांस मोकळे सोडीनात. ३४ त्यांचा
उद्धारकर्ता समर्थ आहे; सेनाधीश परमेश्वर हें त्याचें
नाम आहे; तो त्यांच्या पक्षानें लढेलच, म्हणजे मग तो
पृथ्वीस विसावा देईल, व बाबेलच्या रहिवाश्यांना
घाबरे करील. ३५ परमेश्वर म्हणतो, खास्द्यांवर
तरवार उपसली आहे; आणि ती बाबेलाचे रहिवासी,
तिचे सरदार व तिचे ज्ञानी यांजवर उपसली आहे.
३६ वाचाळांवर तरवार उपसली आहे; ते वेडे बनतील,
त्याच्या वीरांवर तरवार उपसली आहे; ते फजीत
होतील. ३७ त्यांच्या घोड्यांवर, त्यांच्या रथांवर व
त्याच्यांत राहणाऱ्या सर्व मिश्र जातींवर तरवार
उपसली आहे, ते स्त्रिया बनतील, त्याच्या निधींवर
तरवार उपसली आहे, ते लुटीस जातील. ३८ त्याच्या
जलप्रवाहांस झळ लागेल व ते सुकून जातील; कारण
तो देश कोरीव मूर्तींचा आहे, त्यांतल्या लोकांस
मूर्तींचें वेड लागलें आहे. ३९ ह्यास्तव वनपशु रान-
कुत्र्यांसह तेथें राहतील, शहामृग तेथें राहतील; तेथें
कदाकाळीं वस्ती होणार नाहीं; पिढ्यानपिढ्या तेथें
कोणी वस्ती करणार नाहीं. ४० परमेश्वर म्हणतो,
सदोम व गमोरा व त्यांच्या आसपासचीं नगरें यांचा
देवानें समूळ नाश केला, तसाच तेथें कोणी राहणार
नाहीं, एकहि मनुष्य तेथें बिऱ्हाड करणार नाहीं.
४१ पाहा, उत्तरेकडून एक राष्ट्र, मोठें राष्ट्र येत आहे;
पृथ्वीच्या दिगंतापासून बहुत राजे उठत आहेत.
४२ ते धनुष्य व भाले धारण करितात; ते क्रूर आहेत,
त्यांस दयामाया नाहीं; ते सागराप्रमाणें गर्जना करितात,
ते घोड्यांवर स्वार झाले आहेत. हे बाबेलकन्ये, ते
युद्धास सिद्ध झाल्याप्रमाणें तुजवर येत आहेत.
४३ त्यांचा लौकिक बाबेलाच्या राजानें ऐकला आहे,
त्याचे हात गळाले आहेत; प्रसवणाऱ्या स्त्रीप्रमाणें क्लेश
आणि कळा त्यास लागल्या आहेत. ४४ पाहा, यार्देने-
च्या घोर अरण्यांतून जसा सिंह तसा तो त्या मजबूत
वस्तीवर येईल; पण मी त्यांस त्या वस्तीपासून एका
क्षणांत पळवीन; ज्यास निवडितील त्यास तीवर नेमीन;
कारण मजसमान कोण आहे ? मला न्यायसभेसमोर कोण
आणील ? कोणता मेंढपाळ मजसमोर उभा राहील ?
४५ ह्यामुळें परमेश्वरानें बाबेलाविरुद्ध केलेला संकल्प,
व खास्द्यांच्या देशाविरुद्ध केलेल्या योजना ऐकून घ्या;

ते त्यांस, कळपांतील लहानसानांस, निश्चयें ओढीत
नेतील; त्यांची वस्ती खात्रीनें त्यांच्यामुळें विस्मय
पावेल. ४६ बाबेल घेण्याच्या वेळीं झालेल्या आवाजानें
पृथ्वी कांपत आहे, तिचा आवाज राष्ट्रांमध्यें ऐकूं
येत आहे.

५१

१ परमेश्वर म्हणतो, पाहा, मी बाबेलावर
व लेब-कामाईच्या[1] रहिवाश्यांवर एका विध्वं-
सकाच्या मनास प्रवृत्त करीत आहें. २ मी
बाबेलावर परदेशीय पाठवीन; ते त्याला उफणतील व
त्याचा देश उजाड करितील; कारण ते संकटसमयीं त्याला
चोहोंकडून घेरितील. ३ धनुर्धाऱ्यानें धनुष्य वाकवूं नये,
चिलखत घालून त्यानें उभें राहूं नये; त्याच्या
तरुणांवर दया करूं नका; त्याच्या सर्व सैन्याचा विध्वंस
करा; ४ म्हणजे खास्द्यांच्या देशांत लोक वध पावून
पडतील, त्याच्या आळ्यांतून विंधिलेले पडतील.
५ कारण जरी इस्राएलाच्या पवित्र प्रभूविरुद्ध केलेल्या
अपराधांनीं त्याचा देश भरून गेला आहे, तरी इस्राएलास
व यहूदास त्यांचा देव, सेनाधीश परमेश्वर यानें सोडिलें
नाहीं. ६ बाबेलांतून पळून जा, तुम्ही आपआपले
जीव वांचवा; त्याच्या दुष्कर्मामुळें तुम्ही आपला नाश
करून घेऊं नका; कारण परमेश्वराचा हा सूड घेण्याचा
समय आहे; त्याच्या करणीचें तो त्याला प्रतिफळ देत
आहे. ७ बाबेल परमेश्वराच्या हातांतला सर्व पृथ्वीस
मस्त करणारा सोनेरी पेला होता; राष्ट्रें त्याचा द्राक्षारस
प्याली म्हणून तीं वेडीं झालीं आहेत. ८ बाबेल एका-
एकीं पडून भंगला आहे; त्याबद्दल हायहाय करा;
त्याच्या जखमेसाठीं मलम घेऊन जा, त्याला गुण
येईल. ९ आम्हीं बाबेलास बरें करण्याचा प्रयत्न केला,
पण तो बरा झाला नाहीं; त्याला सोडून द्या; चला,
आपण सर्व आपआपल्या देशीं जाऊं; कारण त्याचा
गुन्हा गगनापर्यंत पोहंचला आहे, आकाशापर्यंत चढला
आहे. १० परमेश्वरानें आमची धार्मिकता प्रसिद्ध
केली आहे; चला, परमेश्वर आमचा देव याचें कार्य
आपण सीयोनांत विदित करूं. ११ बाण पाजवा; ढाली
धारण करा; परमेश्वरानें मेद्यांच्या राजांस स्फूर्ति दिली
आहे. नाश करावा अशी त्याच्याविरुद्ध त्याची
योजना आहे; कारण हा परमेश्वराकडून सूड आहे,
त्याच्या मंदिराविषयींचा सूड आहे. १२ बाबेलाच्या
कोटांसमोर ध्वज उभारा; पहारा मजबूत करा, पहारे-
करी ठेवा; छापा घालण्याची तयारी करा; कारण
परमेश्वर बाबेलाच्या रहिवाश्यांविरुद्ध जें बोलला त्याची
योजना करून तें त्यानें सिद्धीसहि नेलें आहे. १३ हे बहुत
जलप्रवाहांजवळ राहणाऱ्या, समृद्ध भांडारें असलेल्या,
तुझा अंतसमय आला आहे, तुझ्या मिळकतीस आळा
बसला आहे. १४ सेनाधीश परमेश्वर आपल्या जीविताची
शपथ वाहून म्हणाला आहे, मी तुझ्यांत टोळांप्रमाणें
मनुष्य भरीन; ते तुजविरुद्ध गर्जना करितील.

१५ त्यानें पृथ्वी आपल्या सामर्थ्यानें उत्पन्न केली,
त्यानें आपल्या ज्ञानानें विश्व स्थापिलें,
आपल्या बुद्धीनें आकाश पसरिलें;
१६ तो आपला शब्द उच्चारितो तों आकाशांत पाण्याचा
गडगडाट होतो;
तो पृथ्वीच्या दिगंतांपासून वाफेचे लोट
वर चढवितो,
तो पावसासाठीं विजा सिद्ध करितो;
व आपल्या भांडारांतून वायु बाहेर काढितो.
१७ प्रत्येक मनुष्य पशुतुल्य व ज्ञानशून्य झाला आहे;
प्रत्येक मूर्तिकार मूर्तीमुळें लज्जित झाला आहे.
त्यानें ओतलेली मूर्ति प्रत्यक्ष लबाडीच आहे;
त्यांच्यांत मुळींच प्राण नाहीं.
१८ त्या शून्यरूप असून, उपहासाला पात्र
अशा वस्तु होत;
त्यांचा समाचार घेतेवेळीं त्या नष्ट होतात.
१९ जो याकोबाचा वांटा तो त्यांसारिखा नव्हे,
तर तो सर्वांचा निर्माणकर्ता आहे,
इस्राएल त्याच्या वतनाचा वंश आहे;
सेनाधीश परमेश्वर हें त्याचें नाम आहे.

१ खास्दीलोकदर्शक गुप्त नांव; याचा अर्थ माझ्या विरोध्यांचें काळीज.

२० तूं माझा परशु आहेस, तूं माझीं युद्धशस्त्रें आहेस; तुझ्या द्वारें मी राष्ट्रें मोडून त्यांचे तुकडेतुकडे करीन; तुझ्या द्वारें राज्यें नष्ट करीन. २१ तुझ्या द्वारें मी घोडा व स्वार यांचे तुकडेतुकडे करीन; २२ तुझ्या द्वारें मी रथ व सारथी यांचे तुकडेतुकडे करीन; तुझ्या द्वारें मी नरनारींचे तुकडेतुकडे करीन; तुझ्या द्वारें मी वृद्ध व तरुण यांचे तुकडेतुकडे करीन; आणि तुझ्या द्वारें मी तरुण व तरुणी यांचे तुकडेतुकडे करीन; २३ तुझ्या द्वारें मी मेंढपाळ व त्याचा कळप यांचे तुकडेतुकडे करीन; तुझ्या द्वारें शेतकरी व त्याच्या बैलांची जोडी यांचे तुकडेतुकडे करीन; आणि तुझ्या द्वारें मी अधिपतींचे व नायब अधिपतींचे तुकडेतुकडे करीन. २४ बाबेल व खास्दी देशाचे सर्व रहिवासी यांनीं तुमच्यादेखत जो सर्व अनर्थ सीयोनांत केला आहे त्याचें मी उसनें फेडीन, असें परमेश्वर म्हणतो.

२५ हे सर्व पृथ्वीचा नाश करणाऱ्या विध्वंसगिरी, पाहा, परमेश्वर म्हणतो, मी तुझ्याविरुद्ध आहें; मी आपला हात तुझ्यावर उगारीन, तुझा कडेलोट करीन, जळून कोळ झालेल्या पर्वतासमान मी तुला करीन. २६ तुझ्यांतला दगड कोपऱ्यासाठीं अथवा पायासाठीं कोणी घेणार नाहीं; तर तूं कायमचाच उजाड होशील असें परमेश्वर म्हणतो. २७ पृथ्वीवर ध्वज उभारा, राष्ट्रांमध्यें रणशिंग वाजवा, त्याजविरुद्ध राष्ट्रें सिद्ध करा, अरारात, मिन्नी व आष्कनाज या राज्यांस त्याजवर चढाई करण्यास बोलवा, त्याच्याविरुद्ध सेनापतीची नेमणूक करा; विक्राळ टोळांप्रमाणें घोडे येऊं द्या. २८ त्याजविरुद्ध राष्ट्रें सज्ज करा, मेद्यांचे राजे, त्यांचे अधिपति, त्यांचे सर्व नायब अधिपति व राजाच्या सत्तेंतील सर्व प्रदेश सज्ज करा. २९ पृथ्वी कांपत आहे, वेदना पावत आहे; कारण बाबेल देश उजाड, निर्जन करण्याचे परमेश्वराचे संकेत पूर्ण होत आहेत. ३० बाबेलाचे वीर लढाई करावयाचे थांबले आहेत, ते आपल्या दुर्गांत बसून राहिले आहेत; त्यांचें बल खुंटलें आहे; ते केवळ स्त्रिया बनले आहेत; त्याच्या वस्तीस आग लाविली आहे; त्याचे अडसर मोडिले आहेत. ३१ बाबेलाच्या राजाचें नगर सर्वस्वीं हस्तगत झालें हें त्यास कळविण्यास एकामागें एक हलकारे, एकामागें एक निरोप्ये, धावत आहेत. ३२ नदीचे उतार हस्तगत झाले आहेत, लढवय्ये फजीत झाले आहेत असें ते सांगत आहेत.

३३ कारण सेनाधीश परमेश्वर, इस्राएलाचा देव असें म्हणतो, धान्य मळण्याच्या वेळीं खळें असतें तशी बाबेलकन्या आहे; अजून थोडा अवधि आहे म्हणजे मग तिचा हंगाम येईल. ३४ बाबेलाचा राजा नबुखद्रेस्सर यानें मला खाऊन टाकिलें आहे, त्यानें मला दडून टाकिलें आहे, त्यानें मला रिकामें पात्र करून ठेविलें आहे, त्यानें मला अजगराप्रमाणें गिळिलें आहे, त्यानें आपलें पोट माझ्या पक्वान्नांनीं भरिलें आहे; त्यानें मला बाहेर फेकून दिलें आहे. ३५ सीयोननिवासिनी म्हणो, मजवर व माझ्या शरीरावर केलेला जुलूम बाबेलावर उलटो; व यरुशलेम म्हणो, माझ्या रक्तपाताचा दोष खास्दी देशाच्या रहिवाश्यांवर असो; ३६ ह्यामुळें परमेश्वर असें म्हणतो पाहा, मी तुझ्या पक्षानें लढेन, तुझ्याकरितां सूड उगवीन; मी त्याचा सागर आटवीन, त्याचा झरा सुकवीन. ३७ बाबेल नासाडीचा ढिगार, कोल्ह्यांचें वसतिस्थान, विस्मय व उपहास यांचा विषय आणि निर्जन स्थळ असा होईल. ३८ ते जमून तरुण सिंहांप्रमाणें गर्जना करितात; सिंहिणींच्या पेट्यांप्रमाणें ते गुरगुरतात. ३९ ते धामाघूम झाले म्हणजे मी त्यांच्यासाठीं मेजवानी सिद्ध करीन, त्यांस मस्त करीन, म्हणजे त्यांस हर्षभ्रम होऊन ते कायमचे निद्रावश होतील, उठावयाचे नाहींत, असें परमेश्वर म्हणतो. ४० कोकरांप्रमाणें, एडके व बोकड यांप्रमाणें मी त्यांस वधावयास घेऊन जाईन. ४१ शेशख[1] कसें हस्तगत झालें आहे! सर्व जगाच्या प्रशंसेचा विषय परहस्तीं कसा गेला आहे! राष्ट्रांस बाबेल कसा विस्मयावह झाला आहे! ४२ समुद्र बाबेलावर लोटला आहे; त्याच्या लाटांच्या

१ अथवा: बाबेल (अध्याय २५:२६ पाहा)

समुद्रानें तो झांकून गेला आहे. ४३ त्याचीं नगरें ओस पडलीं आहेत. त्यांतला प्रदेश निर्जल झाला आहे; तेथली भूमि रुक्ष झाली आहे, तेथें मनुष्यवस्ती नाहीं; व त्यांतून कोणी मानवपुत्र येत जात नाहींत. ४४ मी बेल दैवताचा बाबेलांत समाचार घेईन, त्यानें गिळिलें तें त्याच्या तोंडावाटे मी काढीन, राष्ट्रांचा ओघ त्याच्याकडे वाहणार नाहीं; बाबेलाचा तटहि पडेल.

४५ माझ्या लोकांनो, तुम्ही त्याच्यांतून निघून जा! परमेश्वराच्या संतप्त क्रोधापासून तुम्ही प्रत्येक जण आपला बचाव करा. ४६ देशांत ऐकलेल्या अफवेनें तुम्ही आपलें मन कचूं देऊन घाबरूं नका; एक अफवा एका वर्षी व दुसरी दुसऱ्या वर्षी पसरेल; देशांत जुलूम होईल, अधिपति अधिपतीवर उठेल. ४७ यास्तव पाहा, असे दिवस येत आहेत कीं त्यांत मी बाबेलाच्या कोरींव मूर्तींचा समाचार घेईन; त्याचा सर्व प्रदेश लज्जित होईल, त्याचे सर्व लोक त्याच्यांत ठार होऊन पडतील. ४८ आकाश व पृथ्वी आणि त्यांतील सर्व कांहीं हीं बाबेलावर जयजयकार करितील; कारण त्याचा विध्वंस करणारे उत्तरेकडून येत आहेत असें परमेश्वर म्हणतो. ४९ बाबेलानें जसे इस्राएलाचे वधण्यांत आलेले लोक पाडिले तसे बाबेलांत सर्व पृथ्वीवरचे वधण्यांत आलेले लोक पाडण्यांत येतील. ५० जे तुम्ही तरवारीपासून निभावलां आहां ते तुम्ही निघून जा, थांबूं नका! दुरून परमेश्वराचें स्मरण करा, यरुशलेम आपल्या मनांत वागवा. ५१ निंदा आमच्या कानीं पडली म्हणून आम्ही ओशाळे झालों; परमेश्वराच्या मंदिरांतल्या पवित्र स्थानांत परके आले आहेत, म्हणून लज्जेनें आमचीं मुखें व्याप्त झालीं आहेत. ५२ यास्तव परमेश्वर म्हणतो, पाहा, असे दिवस येत आहेत कीं त्यांत मी तिच्या कोरींव मूर्तींचा समाचार घेईन, तिच्या सर्व देशभर घायाळ झालेले कण्हत पडतील. ५३ बाबेल गगनापर्यंत उन्नत झाला असला, त्यानें आपल्या उंच गढ्या अजिंक्य केल्या असल्या तरी मजकडून त्याचा नाश करणारे येतील असें परमेश्वर म्हणतो. ५४ बाबेलांत आरोळीचा ध्वनि येत आहे, खास्द्यांच्या देशांतून विध्वंसाचा गोंगाट होत आहे; ५५ कारण परमेश्वर बाबेलास उजाड करीत आहे, त्याच्यांतला कलकलाट नाहींसा करीत आहे; त्यांच्या शब्दलहरींचा ध्वनि महासागराच्या गर्जनेसारखा आहे; त्यांच्या गोंगाटाचा ध्वनि होत आहे; ५६ कारण त्याजवर म्हणजे बाबेलावर विध्वंस करणारे आले आहेत, त्याचे वीर कैद झाले आहेत; त्यांचीं धनुष्यें भंग पावलीं आहेत; कारण परमेश्वर सूड घेणारा देव आहे, तो खात्रीनें प्रतिफळ देईल. ५७ मी त्याचे सरदार, त्याचे ज्ञानी, त्याचे अधिपति व नायब अधिपति, आणि त्याचे वीर यांस मस्त करीन; ते कायमचे निद्रावश होतील, ते उठावयाचे नाहींत, असें सेनाधीश परमेश्वर, हें नाम धारण करणारा राजेश्वर म्हणतो. ५८ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, बाबेलचे रुंद तट समूळ पाडितील, त्याच्या उंच वेशी अग्नीनें भस्म होतील; अशी राष्ट्रांच्या श्रमाची फलप्राप्ति शून्यवत होईल, राष्ट्रांचें श्रमफळ हें अग्नीला भक्ष्य होईल, ते व्यर्थ शिणतील.

५९ यहूदाचा राजा सिद्कीया आपल्या कारकीर्दीच्या चौथ्या वर्षी बाबेलास गेला, त्याच्याबरोबर सराया बिन नेरीया बिन मासेया गेला होता, त्यास यिर्मया संदेष्ट्यानें जें आज्ञावचन सांगितलें तें हें. सराया बिनीवाला सरदार होता. ६० बाबेलावर जें सर्व अरिष्ट येणार होतें तें म्हणजे बाबेलाविरुद्ध जीं सर्व वचनें लिहिण्यांत आलीं होतीं तीं यिर्मयानें एका ग्रंथांत लिहून ठेविलीं होतीं. ६१ यिर्मया सरायास म्हणाला, तूं बाबेलास पोहंचलास म्हणजे हीं सर्व वचनें अवश्य वाच, ६२ आणि म्हण, हे परमेश्वरा, तूं या स्थानाविषयीं म्हणाला आहेस कीं तें नष्ट होईल, त्यांत कोणी मनुष्य अथवा पशु राहणार नाहीं, तें कायमचें ओसाड होईल. ६३ मग तूं हा ग्रंथ वाचण्याचें संपविल्यावर त्याला एक धोंडा बांधून फरात नदींत तो फेकून दे; ६४ असें करून म्हण कीं याच प्रकारें मी बाबेलावर जें अरिष्ट आणणार त्यामुळें तो बुडेल, वर येणार नाहीं; ते व्यर्थ शिणतील.

एथवर यिर्मयाचीं वचनें आहेत.

५२ १ सिदकीया राज्य करूं लागला तेव्हां तो एकवीस वर्षांचा होता; त्यानें यरुशलेमांत अकरा वर्षें राज्य केलें; त्याच्या आईचें नांव हमूटल; ती लिब्ना येथील यिर्मया याची कन्या.
२ यहोयाकीमाप्रमाणें त्याचें वर्तन असून परमेश्वराच्या दृष्टीनें जें वाईट तें त्यानें केलें. ३ परमेश्वराच्या कोपामुळें यरुशलेम व यहूदा यांची अशी दशा झाली कीं शेवटीं त्यानें त्यास आपल्या दृष्टीआड केलें; सिदकीयानें बाबेलाच्या राजाविरुद्ध बंड केलें. ४ त्याच्या कारकीर्दीच्या नवव्या वर्षाच्या दहाव्या महिन्यांत दशमीस बाबेलाचा राजा नबुखद्नेस्सर आपली सर्व सेना घेऊन यरुशलेमावर चढाई करून आला; त्यानें त्याच्यासमोर तळ देऊन सभोवार मेढेकोट उभारिले. ५ सिदकीया राजाच्या कारकीर्दीच्या अकराव्या वर्षापर्यंत नगरास वेढा पडला होता. ६ चौथ्या महिन्याच्या नवमीपासून नगरांत एवढी महागाई झाली कीं देशाच्या लोकांस कांहीं खावयास मिळेना. ७ मग नगराच्या तटास एक खिंड पाडण्यांत आली; त्या समयीं दोहों तटांच्यामध्यें जी वेस राजाच्या बागेनजीक होती त्या वाटेनें सर्व योद्धे रातोरात पळून गेले; नगरास खास्द्यांचा वेढा पडलाच होता; इकडे त्यांनीं अराबाचा रस्ता धरिला. ८ तेव्हां खास्दी सेनेनें राजाचा पाठलाग केला; त्यांनीं सिदकीयास यरीहोच्या मैदानांत गांठिलें, व त्याच्या सर्व सैन्याची दाणादाण केली. ९ मग त्यांनीं राजास पकडून हमाथ देशांतील रिब्ला येथें बाबेलाच्या राजाकडे नेलें; त्यानें त्याची शिक्षा ठरविली. १० बाबेलाच्या राजानें सिदकीयाचे पुत्र त्याच्या डोळ्यांदेखत वधिले; तसेंच त्यानें यहूदाचे सर्व सरदार रिब्ला येथें मारून टाकिले; ११ मग त्यानें सिदकीयाचे डोळे फोडिले; बाबेलाच्या राजानें त्याला बेड्या घालून बाबेलास नेलें व त्याच्या मरणाच्या दिवसापर्यंत त्याला कैदेंत ठेविलें.

१२ पांचव्या महिन्याच्या दशमीस बाबेलाचा राजा नबुखद्नेस्सर याच्या कारकीर्दीच्या एकुणिसाव्या वर्षी बाबेलाच्या राजाच्या तैनातीस असणारा गारद्यांचा नायक नबूजरदान यरुशलेमास आला. १३ त्यानें परमेश्वराचें मंदिर व राजवाडा हीं जाळून टाकिलीं व यरुशलेमांतलीं सगळीं मोठमोठीं घरें जाळून टाकिलीं.
१४ गारद्यांच्या नायकाबरोबर आलेल्या खास्द्यांच्या सर्व सैन्यानें यरुशलेमाचे सर्व तट पाडून टाकिले. १५ मग गारद्यांचा नायक नबूजरदान यानें देशांतले अगदीं कंगाल लोक, नगरांत उरलेले अवशिष्ट लोक, फितूर होऊन बाबेलच्या राजाच्या पक्षास मिळालेले लोक व अवशिष्ट राहिलेले कारागीर या सर्वांस बंदिवान करून नेलें. १६ तरी गारद्यांचा नायक नबूजरदान यानें देशांतले जे लोक अतिशयित कंगाल होते त्यांस द्राक्षीच्या मळ्यांची व शेतांची मशागत करण्यास मागें ठेविलें. १७ परमेश्वराच्या मंदिरांत असलेले पितळेचे खांब, परमेश्वराच्या मंदिरांतला पितळी गंगाळसागर व त्याच्या बैठकी हीं खास्दी लोकांनीं फोडूनतोडून त्यांचें सर्व पितळ बाबेलास नेलें. १८ पात्रें, पावडी, चिमटे, वाटगे, धूपदानें आणि सेवेचीं सर्व पितळेचीं उपकरणें त्यांनीं नेलीं. १९ यांखेरीज, पेले, अग्निपात्रें, वाटगे, बहुगुणीं, समया, चमचे, कटोरे वगैरे जेवढीं सोन्याचीं होतीं त्यांचें सोनें व जीं चांदीचीं होतीं त्यांची चांदी गारद्यांच्या सरदारानें नेली. २० दोन खांब, गंगाळसागर व त्याच्या बैठकीखालचे बारा पितळी बैल हे शलमोनानें परमेश्वराच्या मंदिरासाठीं केले होते, या सर्व उपकरणांची पितळ अतिशय होती. २१ एका एका खांबाची उंची अठरा हात होती, व त्याच्या घेराला बारा हात दोरी लागे; त्याची जाडी चार बोटें होती; खांब पोकळ होता. २२ त्यांच्या वरल्या भागीं पितळेचे कळस होते; एकेका कळसाची उंची पांच हात होती; त्याच्यासभोवतीं सर्व जाळीकाम व डाळिंबें पितळेचीं होतीं; दुसऱ्या खांबावरहि तसेंच काम व डाळिंबें होतीं. २३ चोहों बाजूंस शाण्णव डाळिंबें होतीं; एकंदर जाळीकामावर सर्व मिळून शंभर डाळिंबें होतीं. २४ गारद्यांच्या सरदारानें मुख्य याजक

सराया, दुय्यम याजक सफन्या व तीन द्वारपाळ यांस
पकडून नेलें; २५ योद्धयांवर नेमिलेल्या एका खोजास
त्यानें नगरांतून पकडून नेलें; राजाच्या हुजुरास अस-
णारे सात पुरुष त्याला शहरांत आढळले त्यांस त्यानें
नेलें; त्याप्रमाणेंच लोकांची सैन्यांत भरती करणारा
सेनापतीचा चिटणीस आणि नगरांत सांपडलेल्या लोकां-
पैकीं साठ असामी त्यांसहि त्यानें नेलें. २६ गारद्यांचा
सरदार नबूजरदान यानें त्यांस पकडून रिब्ला येथें
बाबेलच्या राजाकडे नेलें. २७ बाबेलच्या राजानें त्यांस
हमाथ देशांतील रिब्ला येथें मार देऊन ठार केलें. या
प्रकारें यहूदी लोकांस त्यांच्या देशांतून कैद करून नेलें.
२८ नबुखद्रेस्सरानें जे लोक पकडून नेले ते हे : सातव्या
वर्षी तीन हजार तेवीस यहूदी नेले; २९ नबुखद्रेस्सरा-
च्या कारकीर्दीच्या अठराव्या वर्षी यरुशलेमाहून आठशें
बत्तीस मनुष्यें नेलीं. ३० नबुखद्रेस्सराच्या कारकीर्दीच्या
तेविसाव्या वर्षी गारद्यांचा नायक नबूजरदान यानें
सातशें पंचेचाळीस यहूद्यांना पकडून नेलें; एकंदर
चार हजार सहाशें लोकांना नेण्यांत आलें.

३१ यहूदाचा राजा यहोयाखीन याच्या बंदिवासाच्या
सदतिसाव्या वर्षी, म्हणजे ज्या वर्षी अवील-
मरोदख बाबेलचा राजा झाला, त्याच्या बाराव्या
महिन्याच्या पंचविसाव्या दिवशीं त्यानें यहूदाचा राजा
यहोयाखीन याचें डोकें वर करून त्याला कारागृहांतून
बाहेर काढिलें; ३२ त्याजशीं त्यानें गोड भाषण करून
बाबेलांत जे राजे त्याच्या बंदींत होते त्यांच्याहून त्यास
उच्च आसन दिलें. ३३ त्यानें आपलीं कारागृहांतील
वस्त्रें बदललीं, व तो आमरण नित्य राजाच्या पंक्तीस
जेवीत असे. ३४ त्याच्या निर्वाहाकरितां त्याला
बाबेलच्या राजानें कायमची नेमणूक करून दिली, ती
त्याला आमरण नित्य मिळत होती.

# यिर्मयाचें विलापगीत



१ १ हाय हाय! लोकांनीं गजबजलेली जी नगरी
ती कशी एकांतांत बसली आहे!
राष्ट्रांमध्यें जी थोर तिला कसें वैधव्य आलें
आहे!
परगण्यांमध्यें जी राणी ती कशी करभार देणारी
झाली आहे!
२ ती रात्रभर रुदन करीत राहते, तिच्या गालांवर
अश्रु आलेले आहेत;
तिच्या सर्व वल्लभांपैकीं तिचें सांत्वन करणारा
कोणी नाहीं;
तिच्या सर्व मित्रांनीं तिला दगा दिला आहे;
ते तिचे शत्रु बनले आहेत.
३ यहूदाची कन्या जुलमामुळें व बिकट दास्यामुळें
बंदिवान होऊन गेली आहे;
ती राष्ट्रांमध्यें राहत आहे, तिला चैन नाहीं;
तिचा पाठलाग करणाऱ्या सर्वांनीं तिला संकटा-
वस्थेंत गांठिलें आहे.
४ पर्वणीस जाणारे कोणी नाहींत म्हणून सीयोनेचे
मार्ग शोक करीत आहेत;
तिच्या सर्व वेशी उजाड झाल्या आहेत; तिचे
याजक उसासे टाकीत आहेत;
तिच्या कुमारी खिन्न झाल्या आहेत,
ती स्वतः कष्टी आहे.
५ तिच्या शत्रूंचें वर्चस्व झालें आहे; तिचा द्वेष
करणारे चैनींत आहेत;
कारण तिच्या बहुत अपराधांमुळें परमेश्वरानें

तिला पीडिलें आहे;
वैऱ्यापुढें तिचीं मुलें बंदिवान होऊन गेलीं आहेत.
६ सीयोनकन्येचें तेज सर्व गेलें आहे;
तिचे सरदार चारा नसलेल्या हरिणांसारिखे
झाले आहेत;
ते पाठलाग करणाऱ्यापुढून हतबल होऊन
पळाले आहेत.
७ यरुशलेम आपल्या क्लेशाच्या व
भटकण्याच्या दिवसांत
आपल्या सर्व प्राचीन रम्य वस्तूंचें स्मरण करिते;
जूलूम करणाऱ्याच्या हातीं तिचे लोक लागले
तेव्हां तिला कोणी साहाय्यकर्ता नव्हता;
तिच्या शत्रूंनीं तिला पाहून ती उजाड झाली
म्हणून तिची थट्टा मांडिली.
८ यरुशलेमेनें घोर पातक केलें आहे; म्हणून ती
किळसवाणी झाली आहे:
जे तिचा आदर करीत ते सर्व तिला तुच्छ
मानीत आहेत, कारण त्यांनीं तिची नग्नता
पाहिली आहे;
ती उसासे टाकिते, तिनें पाठ फिरविली आहे.
९ तिचा विटाळ तिच्या अंगावरील वस्त्राला लागला
आहे; ती आपला अंतकाळ स्मरली नाहीं;
म्हणून ती विलक्षण प्रकारें अधोगतीस गेली आहे;
तिचें सांत्वन करणारा कोणी नाहीं.
हे परमेश्वरा, माझी विपत्ति पाहा! वैरी तोरा
मिरवीत आहे;
१० वैऱ्यानें तिच्या सर्व रम्य वस्तूंवर आपला हात
फिरविला आहे;
विदेशी तिच्या पवित्रस्थानांत आले हें तिनें
पाहिलें आहे;
त्यांनीं तुझ्या समाजांत येऊं नये अशी तूं आज्ञा
केली होती.
११ तिचे सर्व लोक उसासे टाकीत आहेत,
अन्नान्न करीत आहेत,
आपला प्राण वांचविण्यास त्यांनीं भाकरीच्या मोब-
दला आपल्या रम्य वस्तु दिल्या आहेत;
हे परमेश्वरा, लक्ष लावून पाहा, मी कशी तुच्छ
झालें आहें!
१२ येणाऱ्याजाणाऱ्यांनो, हें पाहून तुम्हांस कांहींच
वाटत नाहीं काय?
परमेश्वरानें आपल्या संतप्त क्रोधाच्या दिवशीं
मला दुःख दिलें;
ह्या माझ्या दुःखासारखें दुसरें कोणतेंहि दुःख
आहे काय, हें लक्षपूर्वक पाहा.
१३ त्यानें माझ्या हाडांस वरून अग्नि लाविला, तीं
त्यानें ग्रासून टाकिलीं;
त्यानें माझ्या पायांसाठीं पाश मांडिला, त्यानें
मला मागें वळविलें;
त्यानें मला उजाड, सदा कोमेजलेली असें
केलें आहे.
१४ माझ्या अपराधांचें जूं त्यानें आपल्या हातांनीं
जखडिलें आहे;
माझे अपराध एकत्र गुंफिले आहेत; ते माझ्या
मानेला लागले आहेत; त्यानें माझें बळ
खचविलें आहे;
ज्यांच्यापुढें मला उठतां येत नाहीं अशांच्या हातीं
प्रभूनें मला दिलें आहे.
१५ प्रभूनें माझ्यामधले माझे सर्व वीर
तुच्छ केले आहेत;
माझ्या तरुणांस चिरडून टाकावें म्हणून त्यानें
माझ्याविरुद्ध प्रचंड समुदाय बोलावला आहे;
यहूदाच्या कुवार कन्येला प्रभूनें द्राक्षकुंडांत
तुडविलें आहे.
१६ या सर्वांमुळें मी रडत आहें; माझा डोळा,
माझा डोळा अश्रु ढाळीत आहे;
कारण माझ्या जिवाचें समाधान व सांत्वन कर-
णारा मला अंतराला आहे;
माझीं मुलें नष्ट झालीं आहेत कारण शत्रु प्रबल
झाला आहे.
१७ सीयोनेनें आपले हात पसरिले पण तिचें सांत्वन

करणारा कोणी नाहीं;
परमेश्वरानें याकोबासंबंधानें आज्ञा केल्यावरून
त्याच्या वैऱ्यांनीं त्याला घेरिलें आहे;
यरुशलेम त्यांच्यामध्यें अशुचि झालें आहे.
१८ परमेश्वर न्यायपरायण आहे; मीं तर त्याच्या
आज्ञेविरुद्ध बंड केलें आहे.
अहो सर्व लोकहो, आतां ऐका, माझें दुःख पाहा;
माझ्या कुमारी व माझे तरुण हीं बंदिवान होऊन
गेलीं आहेत.
१९ मीं आपल्या वल्लभांस बोलाविलें, पण त्यांनीं मला
दगा दिला आहे;
आपला जीव वांचवावा म्हणून आपल्यासाठीं अन्न
शोधितां शोधितां
माझे याजक व माझे वडील जन नगरांत मेले.
२० हे परमेश्वरा, पाहा, मी किती संकटांत आहें!
माझ्या आंतड्यांस पीळ पडला आहे;
माझ्या मनाची खळबळ झाली आहे, कारण मी
फार बंडखोर झालें होतें:
बाहेर पाहावें तों तरवार मला निर्वंश करिते,
आंत पाहावें तों मृत्यु आहे.
२१ त्यांनीं ऐकलें कीं मी उसासा टाकीत आहें व मला
सांत्वन देणारा कोणी नाहीं;
माझ्या सर्व वैऱ्यांनीं माझ्या विपत्तीविषयीं ऐकलें
आहे; तूं हें केलें म्हणून त्यांस आनंद झाला आहे.
तूं नेमिलेला दिवस आणिला म्हणजे ते
मजसारिखे होतील.
२२ त्यांची सर्व दुष्टता तुजपुढें येवो;
तूं माझ्या सर्व अपराधांमुळें माझें जसें केलें तसें
त्यांचें कर;
कारण माझे उसासे बहुत आहेत व माझें हृदय
म्लान आहे.

२
१ हाय हाय! प्रभु सीयोनकन्येस क्रोधरूप
अभ्रानें कसा वेष्टीत आहे!
त्यानें इस्राएलाचें वैभव आकाशांतून पृथ्वीवर
झुगारून दिलें आहे;
त्यानें आपल्या संतापाच्या दिवशीं आपल्या पादा-
सनाचें स्मरण केलें नाहीं.
२ प्रभूनें याकोबाचीं सर्व वसतिस्थानें गिळून टाकिलीं
आहेत, गय केली नाहीं;
त्यानें आपल्या क्रोधानें यहूदाच्या कन्येचे दुर्ग
मोडून टाकिले आहेत;
त्यानें ते धुळीस मिळविले आहेत;
त्यानें राज्य व त्यांतले सरदार यांस भ्रष्ट केलें आहे.
३ त्यानें संतप्त क्रोधानें इस्राएलाचें हरएक शृंग छेदून
टाकिलें आहे;
शत्रु समोर असतां त्यानें आपला उजवा हात
माघारीं घेतला आहे;
सभोवतालचें सर्व कांहीं चाटून जाणाऱ्या ज्वाले-
सारिखा त्यानें याकोबांत पेट घेतला आहे.
४ त्यानें वैऱ्याप्रमाणें आपलें धनुष्य वाकविलें आहे,
तो आपला उजवा हात उगारून शत्रूप्रमाणें
उभा राहिला आहे;
दृष्टीस रम्य असे सर्व त्यानें मारून टाकिले आहेत;
त्यानें सीयोनकन्येच्या तंबूवर अग्नीप्रमाणें आपला
संतप्त क्रोध वर्षिला आहे.
५ प्रभु वैऱ्यासारिखा झाला आहे; त्यानें इस्राएलास
गिळून टाकिलें आहे;
त्यानें तिचे सर्व महाल गिळून टाकिले आहेत,
त्यानें त्याचे दुर्ग मोडून टाकिले आहेत;
त्यानें यहूदाच्या कन्येचें कण्हणें व आक्रंदन बहु-
गुणित केलें आहे.
६ बागेंतला मांडव उद्ध्वस्त करावा त्याप्रमाणें त्यानें
आपला मांडव उद्ध्वस्त केला आहे;
त्यानें आपल्या सभास्थानाचा विध्वंस केला आहे;
परमेश्वरानें, सण व शब्बाथ यांचा सीयोनांत विसर
पाडिला आहे;
त्यानें आपल्या क्रोधसंतापानें राजा व याजक
यांचा धिक्कार केला आहे.
७ परमेश्वरानें आपल्या वेदीचा त्याग केला आहे,

त्याला आपल्या पवित्रस्थानाचा वीट आला आहे;
त्यानें त्याच्या वाड्यांच्या भिंती शत्रूच्या हातीं
दिल्या आहेत;
पर्वणीच्या दिवशीं होतो तसा त्यांनीं परमेश्वराच्या
मंदिरांत गोंगाट केला आहे.
८ सीयोनकन्येचा तट नाहींसा करण्याचा परमेश्वरानें
संकल्प केला आहे;
त्यानें सूत्र ताणिलें आहे; तो पाडून टाकण्यापासून
त्यानें आपला हात माघारी घेतला नाहीं.
त्यानें कोट व नगराचा तट यांस शोक करावयास
लाविलें आहे; तें दोन्ही म्लान झाले आहेत.
९ तिच्या वेशी जमिनींत खचल्या आहेत; त्यानें
तिचे अडसर मोडून नष्ट केले आहेत;
तिचा राजा व तिचे सरदार धर्मशास्त्र नसलेल्या
राष्ट्रांत आहेत;
तिच्या संदेष्ट्यांसहि परमेश्वरापासून कांहीं दृष्टांत
होत नाहीं.
१० सीयोनकन्येचे वडील जन जमिनीवर बसले आहेत;
ते स्तब्ध आहेत;
त्यांनीं आपल्या डोक्यांवर धूळ उडविली आहे;
त्यांनीं गोणताटाचीं वस्त्रें परिधान केलीं आहेत;
यरुशलेमाच्या कुमारी आपलीं डोकीं भूमीपर्यंत
लववीत आहेत.
११ माझे डोळे अश्रूंनीं जर्जर होत आहेत, माझ्या
आंतड्यांना पीळ पडत आहेत;
माझ्या लोकांच्या कन्येच्या विनाशामुळें माझें
काळीज फाटून भूमीवर पडलें आहे;
कारण बालकें व तान्हीं नगराच्या आळ्यांत
मूर्च्छित होऊन पडलीं आहेत.
१२ घायाळ झालेल्यांप्रमाणें नगराच्या आळ्यांत
मूर्च्छित होऊन
आपल्या मातांच्या उराशीं त्यांनीं प्राण सोडिला,
तेव्हां तीं आपल्या मातांस म्हणालीं, धान्य व
द्राक्षारस हीं कोठें आहेत ?
१३ मी तुला बोधाच्या कोणत्या गोष्टी सांगूं ? हे यरु-
शलेमकन्ये, मी तुला कोणाची उपमा देऊं ?
हे सीयोनेच्या कुमारी कन्ये, तुझें सांत्वन करण्या-
साठीं मी तुझी कोणाबरोबर तुलना करूं ?
तुझा विनाश सागरासारखा मोठा आहे; तुला कोण
बरें करील ?
१४ तुझ्या संदेष्ट्यांनीं तुजसंबंधानें निरर्थक व मूर्ख-
पणाच्या गोष्टींचा दृष्टांत पाहिला;
तुझा बंदिवास उलटण्यासाठीं तुझें दुष्कर्म प्रगट
करावयाचें तें त्यांनीं केलें नाहीं;
तर त्यांनीं तुजसंबंधानें निरर्थक व तुला हद्दपार
करण्याजोगे दृष्टांत पाहिले.
१५ येणारेजाणारे सर्व तुला पाहून टाळ्या वाजवितात;
ते यरुशलेमकन्येकडे पाहून धुत्कारतात व डोकें
हालवून म्हणतात,
जिला सौंदर्याची खाण, सर्व पृथ्वीचें आनंदभुवन
म्हणतात, तें हें का नगर ?
१६ तुझ्या सर्व शत्रूंनीं तुजवर आपलें तोंड
पसरिलें आहे;
ते धुत्कारून दांत खातात; ते म्हणतात, आम्हीं
त्याला गिळून टाकिलें आहे;
खरोखर याच दिवसाची आम्ही अपेक्षा करीत होतों;
आम्हांस हा दिवस लाभला,
हा आम्ही पाहून चुकलों.
१७ परमेश्वरानें योजिल्याप्रमाणें केलें आहे;
त्यानें प्राचीन काळापासून दिलेली ताकीद अंमलांत
आणिली आहे;
त्यानें मोडतोड केली, दया केली नाहीं;
त्यानें शत्रूस तुझ्यावर हर्षविलें आहे, त्यानें
तुझ्या वैऱ्यांचें शृंग उन्नत केलें आहे.
१८ त्यांचें हृदय प्रभूचा धावा करीत आहे;
हे सीयोनकन्येच्या तटा, तूं रात्रंदिवस जलप्रवाहा-
प्रमाणें अश्रु ढाळ, ते खळूं देऊं नको;
तुझ्या डोळ्याच्या बाहुलीला विसावा देऊं नको.
१९ ऊठ, रात्रीच्या प्रहरारंभीं विलाप कर;
प्रभूसमोर आपलें मनोगत पाण्यासारखें ओत;

तुझीं बालकें हरएक गल्लीच्या चवाठ्यावर भुकेनें
व्याकुळ झालीं आहेत,
त्यांच्या प्राणसंरक्षणासाठीं त्याजकडे हात पसर.
२० हे परमेश्वरा, पाहा, हें तूं कोणाला केलें याचा
विचार कर!
स्त्रियांनीं आपल्या पोटचें फळ, आपलीं हातावर
खेळविलेलीं बालकें खावीं काय?
याजक व संदेष्टा यांस प्रभूच्या पवित्रस्थानांत जिवें
मारावें काय?
२१ तरुण व वृद्ध रस्त्यांत जमिनीवर पडले आहेत;
माझ्या कुमारी व माझे तरुण तरवारीनें
पडले आहेत;
तूं आपल्या क्रोधदिनीं त्यांचा वध केला आहे,
तूं त्यांस वधिलें, गय केली नाहीं.
२२ तूं पर्वणीच्या दिवसाप्रमाणें दहशतीच्या बाबी मज-
कडे चोहोंकडून बोलाविल्या;
परमेश्वराच्या क्रोधदिनीं कोणी पळून जाऊन किंवा
निभावून राहिला नाहीं;
ज्यांचें मीं लालनपालन केलें त्यांचा माझ्या शत्रूनें
फडशा उडविला आहे.

# ३

१ मी त्याच्या क्रोधरूप दंडाचें दुःख भोगलेला
मनुष्य आहें.
२ त्यानें मला घेऊन जाऊन, उजेडांत नव्हे,
तर अंधारांत चालावयास लाविलें.
३ खरोखर तो दिवसभर मजविरुद्ध आपला हात
राहून राहून चालवितो.

४ त्यानें माझें मांस व माझी त्वचा हीं जीर्ण
केलीं आहेत;
त्यानें माझीं हाडें मोडिलीं आहेत.
५ त्यानें विष व दुःख यांचा कोट माझ्याभोवतीं
रचिला आहे.
६ जे मागेंच मरून गेले त्यांच्याप्रमाणें तो मला
अंधकारमय स्थळीं बसवितो.

७ त्यानें मजभोवतीं कुंपण केलें म्हणून माझ्यानें बाहेर
पडवत नाहीं; त्यानें माझी बेडी भारी केली.
८ मी धावा करितों व गार्‍हाणें करितों तेव्हां तो
माझ्या विनवणीस प्रतिबंध करितो.
९ त्यानें माझ्या मार्गाभोवतें चिर्‍यांची भिंत बांधिली
आहे; त्यानें माझ्या वाटा वाकड्या केल्या आहेत.

१० टपणार्‍या अस्वलासारिखा, गुप्त जागीं असलेल्या
सिंहासारिखा, तो मला झाला आहे.
११ त्यानें मला वाटेवरून लोटून देऊन माझे फाडून
तुकडे केले आहेत; त्यानें मला उदास केलें
आहे.
१२ त्यानें आपलें धनुष्य वाकविलें आहे, त्यानें मला
बाणाचें निशाण केलें आहे.

१३ त्यानें आपले बाण माझ्या अंतर्यामांत
शिरविले आहेत.
१४ मी आपल्या सर्व लोकांत दिवसभर उपहासाचा व
निंदाव्यंजक पोवाड्याचा विषय झालों आहें.
१५ त्यानें मला क्लेशानें व्यापिलें आहे, तो मला कडू
दवणा पाजितो.

१६ त्यानें मला आपल्या दांतांनीं खडे फोडावयास
लाविलें आहे; त्यानें मला राखेनें माखून काढिलें
आहे.
१७ तूं माझ्या जिवाला शांतीपासून दूर ठेविलें आहे;
समृद्धीला मी पारखा झालों आहें.
१८ तेव्हां मी म्हणालों, माझी जीवनशक्ति, परमेश्वराची
मला वाटत असलेली आशा, गेली आहे.

१९ माझी विपत्ति व माझें भ्रमण, कडू दवणा व विष
यांचें स्मरण कर.
२० माझा जीव त्यांचें स्मरण करीत राहतो म्हणून तो
माझ्या ठायीं वाकला आहे.

२१ हें मी मनांत आणितों म्हणून मला आशा आहे.

२२ आम्ही भस्म झालों नाहीं ही परमेश्वराची दया
होय, कारण त्याच्या करुणेस खंड पडत नाहीं.
२३ ती रोज सकाळीं नवी होते; तुझी सत्यता थोर आहे.
२४ परमेश्वर माझा वतनभाग आहे असें माझा जीव
म्हणतो; म्हणून त्याच्या ठायीं मी आशा ठेवीन.

२५ जे परमेश्वराची आशा धरून राहतात त्यांस,
जो जीव त्याला शरण जातो त्यास,
परमेश्वर प्रसन्न होतो.
२६ परमेश्वरापासून येणाऱ्या तारणाची वाट पाहणें
आणि तीहि मुकाट्यानें पाहणें बरें आहे.
२७ मनुष्यानें आपल्या तारुण्यांत जूं वाहावें हें त्याला
बरें आहे.

२८ त्यानें एकांतीं बसावें व स्वस्थ असावें, कारण
त्यानें त्याजवर हें ओझें ठेविलें आहे.
२९ त्यानें आपलें तोंड मातींत खुपसावें, कदाचित्
अद्यापि आशा असेल.
३० मारत्या इसमाकडे त्यानें आपला गाल करावा;
त्यानें उपहास सोसावा.

३१ कारण प्रभु कायमचा त्याग करणार नाहीं;
३२ तो जरी दुःख देतो तरी तो आपल्या दयेच्या
वैपुल्यानुसार करुणा करितो.
३३ तो कोणास हृदयपूर्वक पीडा करीत नाहीं,
मानवपुत्रांस दुःख देत नाहीं.

३४ पृथ्वीवरील सर्व बंदिवानांस पायांखालीं तुडविणें,
३५ परात्पराच्या समक्ष मनुष्याचे हक्क बुडविणें,
३६ कोणाचा दावा बिघडविणें, असलीं कृत्यें प्रभु
पाहत नाहीं काय?

३७ प्रभूनें आज्ञा केली नसल्यास कोण बोलला आणि
त्याप्रमाणें घडून आलें?
३८ अनिष्ट व इष्ट हीं परात्पराच्या मुखांतून
येत नाहींत काय?
३९ आपल्या पातकांबद्दल शिक्षा होते म्हणून जीवंत
मनुष्यानें कां कुरकूर करावी?

४० चला, आपण आपले मार्ग शोधूं व तपासूं, आणि
परमेश्वराकडे परत जाऊं.
४१ आपण आपले हात वर स्वर्गांतील देवाकडे करून
आपलीं अंतःकरणें त्याजकडे उन्नत करूं.
४२ आम्हीं अपराध केला व फितुरी केली; त्याची तूं
क्षमा केली नाहीं.

४३ तूं क्रोधव्याप्त होऊन आमचा छळ केला; तूं वधिलें,
दया केली नाहीं.
४४ तूं आपणा स्वतःस अभ्रानें आच्छादिलें. प्रार्थनेचा
त्यामधून प्रवेश होत नाहीं.
४५ तूं आम्हांस राष्ट्रांमध्यें केरकचरा
केलें आहे.

४६ आमच्या सर्व शत्रूंनीं आम्हांवर आपलें तोंड
वासिलें आहे.
४७ भय व गर्ता, विध्वंस व नाश हीं आम्हांस प्राप्त
झालीं आहेत.
४८ माझ्या लोकांच्या कन्येचा विनाश झाल्यामुळें
माझे डोळे अश्रुप्रवाह ढाळीत आहेत.

४९ माझे डोळे वाहत आहेत, थांबत नाहींत, कधीं
खळत नाहींत;
५० परमेश्वर आकाशांतून अवलोकन करीपर्यंत ते
खळावयाचे नाहींत.
५१ माझ्या नगरांतील सर्व कन्यांमुळें माझे डोळे
माझ्या जिवास दुःख देत आहेत.

५२ निष्कारण बनलेल्या माझ्या वैऱ्यांनीं पक्ष्यांचा

करावा तसा माझा पाठलाग केला आहे.
५३ गर्तेत ढकलून त्यांनीं माझ्या जिवाचा अंत केला
आहे, मजवर दगड लोटिला आहे.
५४ माझ्या डोक्यावरून पाण्याचे लोट गेले; मी
म्हणालों, माझा अंत होत आहे.

५५ हे परमेश्वरा, अतिशयित खोल गर्तेतून मीं तुझ्या
नामाचा धावा केला.
५६ तूं माझी वाणी ऐकली; माझ्या उसाशाला, माझ्या
आरोळीला, आपला कान बंद करूं नको.
५७ मीं तुझा धावा केला त्या दिवशीं तूं जवळ आलास;
तूं म्हणालास, भिऊं नको.

५८ हे प्रभू, तूं माझ्या जिवाच्या पक्षानें लढलास;
तूं माझ्या जिवास उद्धरिलें.
५९ हे परमेश्वरा, माझा अन्याय झाला तो तूं पाहिला
आहे; तूं माझा न्याय कर.
६० त्यांनीं उगविलेला सर्व सूड, त्यांच्या मजविषयींच्या
सर्व योजना, तूं पाहिल्या आहेत.

६१ हे परमेश्वरा, मजविरुद्ध त्यांनीं केलेली निंदा व
त्यांच्या सर्व योजना तूं ऐकल्या आहेत.
६२ मजवर उठणाऱ्यांच्या तोंडचे शब्द व दिवसभर
चाललेला त्यांचा मजविषयींचा कट तूं
ऐकला आहे.
६३ तूं त्यांचें उठणेंबसणें पाहा; मी त्यांचें उपहास-
गीत झालों आहें.

६४ हे परमेश्वरा, त्यांच्या हातच्या कर्माप्रमाणें तूं त्यांस
प्रतिफळ देशील.

६५ हृदयाची कठोरता हा आपला शाप तूं त्यांस देशील.
६६ तूं क्रोधानें त्यांचा पाठलाग करिशील,
व परमेश्वराच्या आकाशाखालून तूं त्यांचा
विध्वंस करिशील.

## ४

१ सोनें निस्तेज झालें आहे! अति शुद्ध
सोनें कसें बदललें आहे!
पवित्रस्थानाचे पाषाण हरएक रस्त्याच्या
चवाठ्यावर विखरले आहेत.
२ शुद्ध सुवर्णतुल्य सीयोनेचे प्रिय पुत्र
मातीच्या पात्रांच्या, कुंभाराच्या हातच्या कामाच्या
योग्यतेचे मानण्यांत येतात!
३ कोल्ही देखील आपले स्तन आपल्या पिलांस पाजिते;
पण माझ्या लोकांची कन्या रानांतील शहामृगां-
प्रमाणें क्रूर झाली आहे!
४ तान्ह्या मुलाची जीभ तृषेमुळें त्याच्या टाळूस
चिकटते;
लहान मुलें भाकर मागतात पण त्यांस ती
मोडून देण्यास कोणी नाहीं.
५ जे पूर्वी पक्वान्नें खात ते रस्त्यांत दुर्बल होऊन
पडले आहेत;
किरमिजी पोशाखांत जे वाढले ते उकिरड्यांला
आलिंगन देत आहेत.

६ सदोमावर कोणी हात टाकिला नसून एका क्षणांत
तिचा निःपात झाला;
तिच्या पापापेक्षां माझ्या लोकांच्या कन्येचें दुष्कर्म
अधिक झालें आहे.
७ तिचे सरदार[१] बर्फाहून स्वच्छ होते, दुधाहून
पांढरे होते;
ते पोवळ्यांहून कांतीनें लाल होते;
त्यांचें तेज नीलमण्यासारिखें होतें;
८ त्यांचा चेहरा काळोखाहून काळा झाला आहे;
त्यांस आळ्यांतून कोणी ओळखीत नाहीं;
त्यांची त्वचा त्यांच्या हाडांस चिकटली आहे; ती
शुष्क झाली आहे, काष्ठासारिखी झाली आहे.
९ क्षुधेनें मारिलेल्यांपेक्षां तरवारीनें मारिलेले पुरवले;
कारण शेताचा उपज नसल्यामुळें ते व्याकुळ

१ अथवा: नाजीर (गणना ६:२ पाहा)

होऊन क्षय पावतात.
१० कोमलहृदय स्त्रियांच्या हातांनीं आपलीं
अर्भकें शिजविलीं;
तीं माझ्या लोकांच्या कन्येच्या विनाशसमयीं त्यांचें
खाद्य झालीं.
११ परमेश्वरानें आपला क्रोध पूर्ण प्रगट केला आहे,
त्यानें आपला संतप्त क्रोध वर्षिला आहे;
त्यानें सीयोनांत अग्नि पेटविला आहे, त्या अग्नीनें
त्याचे पाय भस्म केले आहेत.
१२ विरोधी व शत्रु यरुशलेमाच्या वेशींत शिरेल,
या गोष्टीवर पृथ्वीवरचे राजे, जगांतले सर्व
रहिवासी विश्वास ठेवीनात.
१३ तिच्या संदेष्ट्यांच्या पातकांमुळें व तिच्या याजकां-
च्या दुष्कर्मांमुळें हें झालें;
त्यांनीं तिच्या वस्तींत धार्मिकांचा रक्तपात
केला आहे.
१४ ते अंधाप्रमाणें रस्त्यांनीं भटकतात; ते रक्तानें
माखले आहेत,
म्हणून लोकांना त्यांच्या वस्त्रांना स्पर्श करवत नाहीं.
१५ दूर व्हा, अमंगळ लोकहो ! दूर व्हा, दूर व्हा, शिवूं
नका, असें त्यांनीं त्यांस ओरडून म्हटलें;
ते पळून जाऊन भटकत राहिले तेव्हां राष्ट्रांतले
लोक म्हणाले, त्यांना आतांपासून येथें वस्ती
करावयाची नाहीं.
१६ परमेश्वराच्या मुखानें त्यांस विखरिलें आहे; तो
आतां त्यांजकडे पाहत नाहीं;
ते याजकांचा मान राखीत नाहींत, वडिलांचा
सन्मान करीत नाहींत.
१७ आमचे डोळे निरर्थक सहाय्याची वाट पाहून
शिणले आहेत;
आम्ही वाट पाहत असतां, साहाय्य करावयास
असमर्थ अशा राष्ट्राची वाट पाहिली.
१८ ते आमच्या पावलांच्या मागोमाग असतात म्हणून
आम्हांस आमच्या आळ्यांत फिरवत नाहीं;
आमचा अंत जवळ आहे, आमचे दिवस भरले
आहेत; आमचा अंत आलाच आहे.
१९ आमचा छळ करणारे आकाशांतील गरुडांपेक्षां
चपल होते;
त्यांनीं डोंगरांवर आमची पाठ पुरविली, रानांत
आम्हांसाठीं दबा धरिला.
२० परमेश्वराचे अभिषिक्त जे आम्ही त्या आमच्या
नाकपुड्यांचा श्वास, त्यांच्या गर्तेत अडकला;
त्याच्यासंबंधानें आम्हांस वाटलें होतें कीं त्याच्या
छायेखालीं आम्ही राष्ट्रांमध्यें जीवित कंठूं.
२१ ऊस देशांत राहणाऱ्या अदोमाच्या कन्ये, आनंद
व हर्ष करून घे;
पेला तुजकडेहि येईल; तूं मस्त होऊन आपणास
नग्न करिशील.
२२ हे सीयोनकन्ये, तुझ्या दुष्टाईचें शासन
आटोपलें आहे;
तो तुला आणखी पकडून नेणार नाहीं;
हे अदोमकन्ये, तो तुझ्या दुष्टाईचा समाचार घेईल.
तो तुझीं पातकें उघडकीस आणील.

५
१ हे परमेश्वरा, आम्हांवर काय गुजरलें
याचें स्मरण कर;
आमच्या अप्रतिष्ठेकडे नजर दे.
२ आमचें वतन परक्यांकडे गेलें आहे;
आमचीं घरें परदेशीयांच्या हातीं गेलीं आहेत.
३ आम्ही पोरकीं, पितृहीन आहोंत;
आमच्या माता जशा काय विधवा आहेत.
४ आमचेंच पाणी आम्ही पैका देऊन पितों;
आमचेंच लाकूड आम्हांस मोल देऊन मिळतें.
५ आमचा छळ करणारे आमच्या मानगुटीस
बसले आहेत;
आम्ही थकलों आहों, आम्हांला विश्रांति नाहीं.
६ आमच्या पोटाला भाकर मिळण्यासाठीं,
आम्ही मिसरी लोकांकडे, अश्शूरी लोकांकडे,
हात पसरितों.
७ आमच्या पूर्वजांनीं पाप केलें, ते नाहींसे झाले आहेत.

आम्ही त्यांच्या दुष्कर्मांचें फळ भोगितों.
८ दास आम्हांवर सत्ता करितात;
त्यांच्या हातांतून आम्हांस सोडविणारा कोणी नाहीं.
९ रानांत चालू असलेल्या तरवारीमुळें
आम्ही आपला जीव मुठींत धरून
आपलें अन्न मिळवितों.
१० क्षुधेच्या तापामुळें
आमची त्वचा भट्टीसारखी तप्त आहे.
११ त्यांनीं सीयोनांतील स्त्रिया,
यहूदाच्या नगरांतील कुमारी, भ्रष्ट केल्या आहेत.
१२ त्यांच्या हातांनीं सरदार लटकविण्यांत आले आहेत;
प्रत्यक्ष वडील माणसांचा मान ठेवण्यांत आला नाहीं.
१३ तरुण जन जातीं वाहून नेतात,
पोरें लाकडाच्या ओझ्याखालीं दबतात.
१४ वेशींत वडील जन दिसत नाहींत,
तरुण आपल्या गायनवादनास अंतरले आहेत.
१५ आमच्या मनाचा हर्ष नाहींसा झाला आहे;
आमचें नृत्य जाऊन शोक आला आहे.
१६ आमच्या मस्तकींचा मुकुट पडला आहे;
आम्हीं पातक केलें म्हणून हायहाय करीत आहीं.
१७ यामुळें आमचें हृदय खचलें आहे;
या गोष्टीमुळें आमचे डोळे मंद झाले आहेत;
१८ सीयोन पर्वत उजाड झाल्यामुळें
ते मंद झाले आहेत;
त्यांतून कोल्हीं फिरत असतात.
१९ हे परमेश्वरा, तूं सर्वकाळ सिंहासनारूढ असतोस,
तुझें सिंहासन पिढ्यानपिढ्या आहे.
२० तूं आम्हांस सर्वकाळ कां विसरतोस ?
दीर्घकाळ आम्हांस कां सोडून देतोस ?
२१ हे परमेश्वरा, तूं आम्हांस आपणाकडे परत घे
म्हणजे आम्ही वळूं;
पूर्वीचे दिवस आम्हांस पुनः आण.
२२ तूं आम्हांस सर्वस्वीं टाकून दिलें आहे,
तूं आम्हांवर फार कोपायमान झाला आहेस.

---

# यहेज्केल



१ १ मी खबार नदीच्या तीरीं पकडून आणिलेल्या
लोकांत राहत होतों, तेव्हां तिसाव्या वर्षाच्या चौथ्या
मासीं पंचमीस असें झालें कीं आकाश दुभागून मला
दिव्यदृष्टांत दिसले. २ हें यहोयाखीन राजाच्या बंदि-
वासाचें पांचवें वर्ष होतें; त्या महिन्याच्या पांचव्या
दिवशीं ३ खास्द्यांच्या देशांत खबार नदीच्या तीरीं
बूजीचा पुत्र यहेज्केल याजक याला परमेश्वराचें वचन
स्पष्टपणें प्राप्त झालें; तेथें परमेश्वराचा वरदहस्त
त्याजवर आला. ४ मीं पाहिलें तों उत्तरेकडून तुफानाचा
वारा सुटला, तेव्हां एक विशाळ मेघ येत असून
त्यामध्यें लपेटलेला एक अग्निगोल होता; त्याभोवतीं प्रभा
फाकली असून अग्नीच्या मध्यभागांतून तृणमण्याच्या-
सारखें तेज झळकत होतें. ५ त्याच्या मध्यभागीं चार
प्राण्यांच्या आकृतींसारखें कांहीं नजरेस पडलें; दिस-
ण्यांत तें मनुष्याकृति होतें. ६ त्या प्रत्येकास चार मुखें
होतीं, व प्रत्येकास चार पंख होते. ७ त्यांचे पाय ताठ
उभे होते आणि त्यांच्या पायांचे तळवे वासराच्या
पायांच्या तळव्यांसारिखे असून उजळ पितळेसारखे
झळकत होते. ८ त्यांच्या चोहों बाजूंस पंखांच्या खालीं
त्यांना माणसांचे हात होते; त्या चौघांस मुखें व पंख
होते. ९ त्यांचे पंख एकाचे दुसऱ्याशीं लागलेले होते;
ते चालतांना वळत नसत, तर ते प्रत्येक पाहिजे

त्या आपल्या मुखाच्या दिशेनें नीट समोर जात.
१० त्या चौघांच्या मुखांपैकीं एक मुख मनुष्याचें होतें,
त्या चौघांचें उजव्या बाजूचें एक मुख सिंहाचें होतें; त्या
चौघांचें डाव्या बाजूचें एक मुख बैलाचें होतें; आणि त्या
चौघांचें एक मुख गरुडाचेंहि होतें, अशीं त्यांचीं मुखें
होतीं. ११ वरच्या अंगीं त्यांचीं मुखें व त्यांचे पंख
विभक्त होते; प्रत्येकाचे दोन पंख जवळील दुसऱ्यांच्या
एका एका पंखाला लागले होते; आणि प्रत्येकाच्या
दोन दोन पंखांनीं त्यांचें शरीर आच्छादिलें होतें.
१२ ते प्रत्येक पाहिजे त्या आपल्या मुखाच्या दिशेनें
नीट समोर जात; आत्मा नेई तिकडे जात; चालतांना
वळत नसत. १३ त्या प्राण्यांचें रूप म्हटलें तर
अग्नीच्या इंगळासारखें, मशालीसारखें दिसत होतें.
अग्नि त्या प्राण्यांमधून खेळत होता; तो धगधगीत
असून त्यांतून विद्युल्लता निघत होती. १४ ते प्राणी
विजेसारखे नागमोडीच्या गतीनें इकडून तिकडे धावत.
१५ मीं त्या प्राण्यांकडे पाहिलें तों त्यांजवळ त्यांच्या
चारहि मुखांच्या बाजूस भूमीवर एक एक चाक होतें.
१६ तीं चाकें व त्यांचा घाट हीं वैडूर्यमण्यांसारखीं
दिसत होतीं; त्या चोहोंचा आकार एकच होता;
त्यांचा आकार व घाट जणूं काय चाकांत चाक असा
होता. १७ ते चालत तेव्हां ते चार दिशांपैकीं
पाहिजे त्या दिशेस नीट समोर चालत; चालतांना
वळत नसत. १८ चाकांच्या धावा पाहिल्या तर त्या
फार उंच व भयानक होत्या; त्या चोहोंच्या धावां-
सभोवतीं सर्वत्र डोळे होते. १९ ते प्राणी चालत
तेव्हां चाकेंहि त्यांबरोबर चालत आणि ते जमीन
सोडून वर चढत तेव्हां चाकेंहि चढत. २० जिकडे
आत्मा नेई तिकडे त्याच्या गतीच्या रोखानें ते जात;
त्यांबरोबर चाकेंहि उचलत, कारण त्या प्राण्यांचा आत्मा
चाकांत होता. २१ ते चालले म्हणजे हीं चालत; ते
थांबले म्हणजे हींहि थांबत; ते जमीन सोडून वर
चढले म्हणजे त्यांबरोबर चाकेंहि चढत; कारण त्या
प्राण्यांचा आत्मा चाकांत होता. २२ त्या प्राण्यांच्या
माथ्यावर चांदव्यासारखें कांहीं होतें, तें दिपविणाऱ्या
व भयानक स्फटिकासारखें दिसलें; तें त्यांच्या डोक्या-
वरून ताणिलेलें होतें. २३ त्या चांदव्याखालीं त्यांचे
पंख नीट पसरून एकमेकांला लागलेले होते; या
बाजूला आणि त्या बाजूला शरीर आच्छादणारे असे
प्रत्येकाला दोन दोन पंख होते. २४ ते चालत असतां
मला त्यांच्या पंखांचा आवाज ऐकूं आला; तो महाजला-
शयांच्या आवाजासारखा, सर्वसमर्थाच्या वाणीसारखा
होता; लष्कराच्या गजबजीप्रमाणें तो मोठा होता; ते उभे
राहत तेव्हां आपले पंख खालीं सोडीत. २५ त्यांच्या
डोक्यांवर असलेल्या चांदव्यांतून वाणी होत असे;
ते उभे राहत तेव्हां आपले पंख खालीं सोडीत.
२६ त्यांच्या डोक्यांवर असलेल्या चांदव्यावर नील-
मण्याच्या सिंहासनासारखें कांहीं दिसत होतें; आणि त्या
सिंहासनावर पुरुष असल्याचा भास होत होता. २७
त्याच्या ठायीं सर्वत्र तृणमण्याच्या तेजासारखा अग्नीचा
भास मला झाला; त्याच्या कमरेपासून वर व त्याच्या
कमरेपासून खालीं अग्नीचा भास मला झाला व त्यांच्या-
भोवतीं प्रभा चमकत होती. २८ पावसाच्या दिवशीं
मेघांत दिसणाऱ्या धनुष्याप्रमाणें त्यांच्याभोवतीं प्रभा
फाकलेली मला दिसली; परमेश्वराच्या तेजाचें हें दर्शन
होतें. मी तें पाहून उपडा पडलों व कोणा बोलणा-
ऱ्याची वाणी माझ्या कानीं आली.

२ १ तो मला म्हणाला, मानवपुत्रा, तूं आपल्या
पायांवर उभा राहा, म्हणजे मी तुजबरोबर बोलेन.
२ तो मजबरोबर बोलत असतां आत्म्यानें माझ्या
ठायीं प्रवेश करून मला माझ्या पायांवर उभें केलें तेव्हां
त्याचें बोलणें मला ऐकूं आलें. ३ तो मला म्हणाला,
हे मानवपुत्रा, मी तुला इस्राएल वंशजांकडे, मजबरो-
बर फितुरी केलेल्या त्या फितुरी राष्ट्रांकडे पाठवितों;
त्यांनीं व त्यांच्या वाडवडिलांनीं आजपर्यंत मजविरुद्ध
वर्तन केलें आहे. ४ हे त्यांचे वंशज उद्धट व कठीण
हृदयाचे आहेत; मी तुला त्यांजकडे पाठवीत आहें; प्रभु
परमेश्वर असें म्हणतो हें त्यांस सांग. ५ ते तुझें ऐकोत
न ऐकोत, निदान त्यांजकडे कोणी तरी संदेष्टा गेला
होता हें त्यांस समजेल; ती तर बोलूनचालून फितुरी

जात आहे. ६ हे मानवपुत्रा, तुझ्याभोवतीं कांटेझुडपें व
कांटे असले, तूं विंचवांमध्यें असलास, तरी त्यांला भिऊं
नको, त्यांच्या शब्दांस भिऊं नको; ती फितुरी जात आहे,
तरी त्यांच्या शब्दांस भिऊं नको; त्यांच्या चर्येस भिऊं
नको. ७ ते ऐकोत न ऐकोत, तूं माझीं वचनें त्यांस
सांग; ते तर अत्यंत फितुरी आहेत. ८ हे मानवपुत्रा,
मी सांगतों तें ऐक; त्या फितुरी जातीप्रमाणें तूं फितुरी
होऊं नको; आपलें तोंड उघड आणि मी देतों तें
खा. ९ मीं पाहिलें तों मजकडे एक हात पुढें झाला;
आणि पाहा, त्या हातांत ग्रंथाचा पट होता; १० तो
त्यानें मजपुढें पसरिला; त्यावर पाठपोट लिहिलें होतें
आणि त्यांत विलाप, शोक व आक्रांत ह्यांविषयींचा लेख
होता. १ तो मला म्हणाला, मानवपुत्रा, तुझ्या-
३ पुढें जें आलें आहे तें सेवन कर; हा पट सेवन
कर व जाऊन इस्राएल घराण्याबरोबर बोल. २ तेव्हां
मीं आपलें तोंड उघडलें आणि त्यानें मला तो पट
सेवन करावयास लाविलें. ३ तो मला म्हणाला,
मानवपुत्रा, जो पट मी तुला देतों तो पोटांत जाऊं दे,
त्यानें आपलीं आंतडीं भर. मीं तो सेवन केला तों तो
माझ्या तोंडांत मधासारखा मधुर लागला.

४ मग तो मला म्हणाला, मानवपुत्रा, जा, इस्राएल
घराण्याकडे जा आणि त्यांजजवळ माझीं वचनें बोल.
५ कारण बाबर ओठांच्या व जड जिभेच्या लोकांकडे
नव्हे; तर इस्राएल घराण्याकडे मी तुला पाठवितों; ६
ज्यांची बोली तुला समजत नाहीं अशीं बाबर ओठांचीं व
जड जिभेचीं अनेक राष्ट्रें आहेत, त्यांकडे मी तुला
पाठवीत नाहीं. त्यांकडे मीं तुला पाठविलें असतें तर
खरोखर त्यांनीं तुझें ऐकलें असतें; ७ पण इस्राएल घराणें
तुझें ऐकणार नाहीं; कारण माझें तें ऐकणार नाहीं;
कां कीं इस्राएलाचें सगळें घराणें कठीण कपाळाचें
व कठीण हृदयाचें आहे. ८ पाहा, मी त्यांच्या
मुद्रेसारखी तुझी मुद्रा वज्रप्राय करितों. त्यांच्या
कपाळासारखें तुझें कपाळ कठीण करितों. ९ मी तुझें
डोकें गारगोटीपेक्षां वज्रप्राय कठीण करितों; त्यांस तूं
भिऊं नको, त्यांच्या कटाक्षांनीं कांपूं नको; ती तर
फितुरी जात आहे. १० आणखी तो मला म्हणाला,
मानवपुत्रा, जीं सर्व वचनें मी तुला सांगतों तीं
आपल्या हृदयांत सांठीव, तीं कानानें ऐक. ११ जा,
पकडून नेलेल्या तुझ्या लोकांच्या वंशजांकडे जाऊन
त्यांजशीं बोल; त्यांस सांग कीं प्रभु परमेश्वर असें
म्हणतो, मग ते तुझें ऐकोत किंवा न ऐकोत.

१२ तेव्हां आत्म्यानें मला उचलून धरिलें आणि
माझ्यामागून त्याच्या स्थानांतून, परमेश्वराच्या वैभवाचा
धन्यवाद असो, असा प्रचंड वेगाचा शब्द झालेला मीं
ऐकला. १३ आणि त्या प्राण्यांचे पंख एकमेकांना
लागत त्यांचा आवाज आणि त्यांच्या बाजूंस असलेल्या
चाकांचा आवाज, असा प्रचंड वेगाचा शब्द मीं ऐकला.
१४ मग आत्म्यानें मला उचलून धरिलें; मी आपल्या
मनाच्या संतापानें क्लेश पावलों तेव्हां परमेश्वराचा
वरदहस्त जोरानें मजवर आला. १५ तदनंतर धरून
नेलेले लोक राहत असत तेथें त्यांजकडे खबार नदीच्या
तीरीं तेल-अबीब ह्या ठिकाणीं मी आलों आणि ते
बसले होते तेथें मी बसलों; भयचकित होऊन सात
दिवस त्यांच्यामध्यें मी बसून राहिलों.

१६ मग ते सात दिवस लोटल्यावर परमेश्वराचें
वचन मला प्राप्त झालें तें असें: १७ मानवपुत्रा, मीं
तुला इस्राएल घराण्यावर पहारेकरी नेमिलें आहे, म्हणून
तूं माझ्या तोंडचें वचन ऐकून माझ्या वतीनें त्यांस बजा-
वून सांग. १८ तूं खात्रीनें मरशील असें मी पातक्यास
म्हणालों असतां तूं जर त्यास बजाविलें नाहीं व
पातक्यानें आपला कुमार्ग सोडून जगावें म्हणून तूं त्यास
बजावून सांगितलें नाहीं, तर तो पातकी आपल्या
दुष्टाईमुळें मरेल; पण त्याच्या रक्ताचा झाडा मी
तुझ्या हातून घेईन. १९ तूं त्या पातक्यास बजाविलें
असून त्यानें आपली दुष्टाई व कुमार्ग हीं सोडलीं
नाहींत, तर तो आपल्या दुष्टाईमुळें मरेल; आणि तूं
आपला जीव बचावला असें होईल. २० तसेंच धार्मिक
आपली धार्मिकता सोडून अधर्म करूं लागला व मीं
त्याच्यापुढें अडखळण ठेविलें तर तो मरेल; तूं त्याला
बजाविलें नसल्यास तो आपल्या पातकामुळें मरेल, व

त्यानें केलेली धार्मिकता जमेस धरण्यांत येणार नाहीं;
पण त्याच्या रक्ताचा झाडा मी तुझ्या हातून घेईन.
२१ पाप करूं नये असें तूं त्या धार्मिकास बजा-
विलें, व त्यानें पाप केलें नाहीं, तर त्यानें बोध
घेतल्यामुळें तो जगेल आणि तूं आपला जीव बचाविला
असें होईल.

२२ तेव्हां तेथें परमेश्वराचा वरदहस्त मजवर आला
व तो मला म्हणाला, ऊठ, खोऱ्यांत जा; तेथें मी
तुजबरोबर बोलेन. २३ मग मी उठून खोऱ्यांत गेलों
तों खबार नदीजवळ मीं पाहिलें होतें तसें परमेश्वराचें
तेज तेथेंहि माझ्यासमोर उभें होतें; तेव्हां मी उपडा
पडलों. २४ नंतर आत्म्यानें माझ्या ठायीं प्रवेश करून
मला माझ्या पायांवर उभें केलें; त्यानें मजबरोबर भाषण
करून म्हटलें, जा, तूं स्वतांला आपल्या घरांत कोंडून
घे. २५ हे मानवपुत्रा, पाहा, तुला बंधनांनीं जखडून
बांधितील, आणि तुला बाहेर त्या लोकांमध्यें जातां
येणार नाहीं; २६ तुझी जीभ तुझ्या टाळूस चिकटे असें
मी करीन, म्हणजे तूं मुका होशील, आणि तूं त्यांचा
निषेधकर्ता होणार नाहींस; कारण तें फितुरी घराणें
आहे; २७ तरी पण मी तुजबरोबर बोलेन तेव्हां मी
तुझें तोंड उघडीन, मग तूं त्यांस सांग कीं प्रभु परमेश्वर
म्हणतो, ज्याला ऐकावयाचें असेल तो ऐको, ज्याला
ऐकावयाचें नसेल, तो न ऐको; तें तर फितुरी घराणें आहे.

४ १ हे मानवपुत्रा, एक वीट घेऊन आपल्यासमोर
मांड; तिच्यावर यरुशलेम नगराचें चित्र काढ.
२ त्याला वेढा पडला आहे, त्यासमोर बुरूज रचून
मोर्चे बांधिले आहेत, त्यापुढें तळ पडला आहे, टक्कर
देऊन भिंत पाडण्याचीं यंत्रें त्याभोवतीं ठेवलीं आहेत,
असें चित्र काढ. ३ मग तूं एक लोखंडी कढई घे;
ती तुझ्यामध्यें व त्या नगरामध्यें जशी काय लोखंडी
भिंत म्हणून ठेव; तूं आपलें तोंड तिच्याकडे कर; तिला
वेढ्याच्या स्थितींत आण; तूं तिला वेढा घालणारा हो.
हें इस्राएल घराण्यास चिन्ह होईल.

४ आणखी तूं आपल्या डाव्या कुशीवर नीज व
इस्राएल घराण्याचा अधर्म त्या कुशीवर ठेव; जितके
दिवस तूं त्या कुशीवर निजून राहशील तितके दिवस
त्यांच्या अधर्माचा भार वाहत राहा. ५ कारण त्यांच्या
अधर्माच्या वर्षांइतके दिवस मीं तुझ्या हिशोबीं गणिले
आहेत; तीनशें नव्वद दिवस तुला इस्राएल घराण्याचा
भार वाहावयाचा आहे. ६ पुनः ते दिवस संपल्यावर
तूं उजव्या कुशीवर नीज व चाळीस दिवस यहूदा
घराण्याच्या अधर्माचा भार वाहा; प्रत्येक वर्षाबद्दल
तुझ्या हिशोबीं मीं एक दिवस धरिला आहे. ७ तूं आपलें
तोंड व उघडा हात यरुशलेमाच्या वेढ्याच्या चित्राकडे
रोखून धर व त्याविरुद्ध संदेश दे. ८ पाहा, मी तुला
बंधनांनीं बांधितों, म्हणजे तूं आपल्या वेढ्याचे दिवस
संपवीपर्यंत या कुशीचा त्या कुशीला वळावयाचा नाहींस.

९ तूं गहूं, जव, पावटे, मसूर, बाजरी व काठ्या गहूं
घेऊन एका पात्रांत घाल, व आपल्यासाठीं त्याची
भाकर कर; तूं आपल्या कुशीवर निजशील त्या
दिवसांच्या संख्येच्या मानानें तीनशें नव्वद दिवस तुला
ती खावयाची आहे. १० तूं जें अन्न खाशील तें
वजनानें रोजचें वीस शेकेल असून तें तूं मधून मधून
खा; ११ आणि पाणी मापानें एक षष्ठांश हीनें[1] पी;
तें तूं मधून मधून पी; १२ जवाच्या भाकरींप्रमाणें ती
भाकर करून खा; ती लोकांसमक्ष मानवी विष्ठेनें भाज.
१३ परमेश्वर बोलला, याप्रमाणें मी इस्रायल वंशजांस
ज्या राष्ट्रांत हाकून देईन त्यांत ते आपली अमंगळ
भाकर खातील. १४ तेव्हां मी म्हणालों, अहा! प्रभु
परमेश्वरा! पाहा, मी कधीं विटाळलों नाहीं; मीं लहान-
पणापासून आजवर कधीं कोणताहि आपोआप मेलेल्या
किंवा पशूंनीं फाडून मारिलेल्या प्राण्यांचें मांस खाल्लें
नाहीं; अमंगळ मांस माझ्या तोंडास शिवलें नाहीं.
१५ मग तो मला म्हणाला, पाहा, मानवी विष्ठेऐवजीं
गाईचें शेण वापरण्याची मी तुला परवानगी देतों;
त्यावर गोवऱ्यांनीं आपली भाकर भाज. १६ आणखी
तो मला म्हणाला, मानवपुत्रा, पाहा, मी यरुशलेमांत
भाकरीचा आधार तोडीन म्हणजे लोक कष्टी होऊन
भाकर तोलून खातील, व भयभीत होऊन पाणी

१ सुमारें एक पक्का शेर.

भागून पितील; १७ कारण भाकर व पाणी यांची
तूट पडेल, लोक एकमेकांकडे पाहून भयचकित
होतील आणि अधर्मावस्थेंत क्षय पावतील.

५ १ हे मानवपुत्रा, तूं एक तीक्ष्ण तरवार घे;
ती न्हाव्याच्या वस्तऱ्याप्रमाणें वापरून आपल्या
डोक्यावर व दाढीवर चालीव; मग तराजू घे आणि
केस तोलून त्यांची वांटणी कर. २ नगराच्या
वेढ्याचे दिवस संपले म्हणजे ह्या केसांचा एक तृतीयांश
नगराच्या मध्यभागीं अग्नीनें जाळून टाक; एक
तृतीयांश केस घेऊन त्यांवर चोहोंकडून तरवार चालीव
आणि उरलेला तृतीयांश वाऱ्यावर उडीव; ह्या प्रकारें मी
तरवार उपसून त्या लोकांची पाठ पुरवीन. ३ त्यांतले
थोडेसे केस घेऊन आपल्या वस्त्राच्या पदरीं बांध. ४ त्यां-
तून पुनः थोडके घेऊन अग्नींत टाकून जाळ, म्हणजे त्यां-
मधून अग्नि निघून इस्राएलाच्या सर्व घराण्यास व्यापील.
५ प्रभु परमेश्वर म्हणतो, पाहा, हें यरुशलेम; हें
राष्ट्रांमध्यें स्थापिलें आहे व ह्याच्याभोवतीं देश वसविले
आहेत. ६ तरी त्यानें दुष्ट आचरण करून माझ्या
निर्णयांस इतर राष्ट्रांपेक्षांहि अधिक विरोध केला,
त्यानें सभोवतालच्या प्रदेशांपेक्षांहि माझ्या नियमांचा
अधिक विरोध केला; कारण त्यांनीं माझ्या निर्णयांचा
अव्हेर केला व माझ्या नेमाप्रमाणें ते चालले
नाहींत. ७ ह्यामुळें प्रभु परमेश्वर म्हणतो, ज्या अर्थी तुम्ही
आपल्या सभोवतालच्या राष्ट्रांपेक्षां अधिक बंडाळी
माजविली व माझ्या नियमांप्रमाणें चाललां नाहीं,
माझे निर्णय पाळिले नाहींत, आणि आसपास राष्ट्रें
आहेत त्यांच्या निर्णयांप्रमाणें देखील वागलां नाहीं,
८ त्या अर्थी प्रभु परमेश्वर म्हणतो, पाहा, मी, मीच
तुझ्याविरुद्ध होईन आणि राष्ट्रांदेखत तुजमध्यें न्याय-
शासन करीन. ९ तुझ्या सर्व अमंगळ कृत्यांमुळें,
आजवर मीं केलें नाहीं व पुनः त्याप्रमाणें करणार
नाहीं, असें मी तुझ्या ठायीं करीन. १० तुझ्यामध्यें
बाप आपल्या मुलांस भक्षितील व मुलें आपल्या
बापांस भक्षितील; व तुझ्या ठायीं न्यायशासन
करीन व तुझे सर्व अवशेष राहिलेले लोक दशदिशांस
विखरून टाकीन. ११ प्रभु परमेश्वर म्हणतो,
माझ्या जीविताची शपथ, तूं माझें पवित्रस्थान आपल्या
सर्व तिरस्करणीय वस्तूंनीं व अमंगळ कर्मांनीं भ्रष्ट
केलें, म्हणून खात्रीनें मी तुजवरची कृपादृष्टि काढून
घेईन, गय करणार नाहीं, दया करणार नाहीं. १२ तुझ्या
वस्तीचा तिसरा हिस्सा पटकीनें मरेल व तुजमध्ये
लोक उपासमारीनें नाश पावतील; तिसरा हिस्सा
तुजभोवतीं तरवारीनें पडेल; व तिसरा हिस्सा
मी दशदिशांस विखरीन; मी तरवारीनें त्यांची
पाठ पुरवीन. १३ अशी माझ्या रागाची पूर्तता होईल
आणि त्यांजवरच्या माझ्या क्रोधाची तृप्ति होऊन माझें
समाधान होईल. मीं त्यांजवरच्या माझ्या क्रोधाचा
शेवट केला म्हणजे ते समजतील कीं मी परमेश्वर
हें आवेशानें बोललों आहें. १४ आणखी तुजभोव-
तालच्या सर्व राष्ट्रांमध्यें मी तुला उजाड करीन, अप-
शब्दाचा विषय करीन, आणि येणारेजाणारे हें पाहतील.
१५ मी क्रोधानें, संतापानें व तीव्र निषेधवाणीनें तुझें
न्यायशासन करीन तेव्हां तुजभोवतालच्या राष्ट्रांस तूं
अपशब्द, निंदा, ताकीद व विस्मय यांचा विषय होशील;
मी परमेश्वर हें म्हणालों आहें; १६ मी तुमचा नाश
करण्यासाठीं उपासमारीचे नाशकारक तीक्ष्ण बाण
सोडीन, तेव्हां तुम्हांवर मी दुष्काळाचा कहर करीन व
तुमचा भाकरीचा आधार तोडीन; १७ मी तुम्हांवर
दुष्काळ व हिंस्र पशु पाठवीन; ते तुम्हांस निःसंतान
करितील; मरी व रक्तपात हीं तुम्हांवर येतील;
मी तुम्हांवर तरवार आणीन; मी परमेश्वर हें
म्हणालों आहें.

६ १ मग परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
२ मानवपुत्रा, तूं आपलें मुख इस्राएलाच्या पर्वतां-
कडे करून त्यांस उद्देशून संदेश दे. ३ असें
म्हण: इस्राएलाच्या पर्वतांनो, प्रभु परमेश्वराचें वचन
ऐका; प्रभु परमेश्वर पर्वत, टेकड्या, नाले व खोरीं
यांस म्हणतो, पाहा, मी, मीच तुम्हांवर तरवार आणून
तुमचीं उच्चस्थानें उध्वस्त करीन. ४ तुमच्या वेद्या
ओसाड होतील, तुमच्या सूर्यमूर्ति फोडून टाकण्यांत येतील;

तुमचे वध पावलेले लोक तुमच्या मूर्तींपुढें पडतील असें मी करीन. ५ मी इस्राएल वंशजांचीं प्रेतें *त्यांच्या* मूर्तींपुढें टाकीन, तुमच्या वेद्यांभोवतीं तुमचीं हाडें विखरीन. ६ तुमच्या सर्व वसतिस्थानांतील नगरें उद्ध्वस्त होतील व उच्चस्थानें उजाड होतील; अशानें तुमच्या वेद्या उद्ध्वस्त व उजाड होतील, तुमच्या मूर्ति *भंगून नष्ट होतील, तुमच्या सूर्यमूर्ति तोडून टाकितील;* अशीं तुमच्या हातचीं कामें नाहींतशीं करितील. ७ तुम्हांमध्यें वध पावलेले पडतील तेव्हां तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर आहें. ८ तरी तुम्ही देशोदेशीं परागंदा व्हाल तेव्हां राष्ट्रांमध्यें तुम्हांपैकीं कांहीं तरवारीपासून निभावून राहतील; असे अवशेष मी राखून ठेवीन. ९ तुम्हांपैकीं निभावलेले ज्या राष्ट्रांत पकडून नेले जातील त्यांत ते माझें स्मरण करितील; तेव्हां मजपासून दूर झालेलें त्यांचें दुराचारी हृदय आणि त्यांनीं मूर्तींकडे लावलेले त्यांचे दुराचारी नेत्र हीं मी वठणीस आणीन; त्यांनीं आपल्या सर्व अमंगळ कृत्यांनीं जें दुष्कर्म केलें, त्यामुळें ते आपणांस निंद्य मानितील. १० तेव्हां ते जाणतील कीं मी परमेश्वर आहें; त्यांजवर हें अरिष्ट आणीन म्हणून मीं सांगितलें तें निरर्थक सांगितलें नाहीं.

११ प्रभु परमेश्वर म्हणतो, आपले हातपाय आपटून म्हण: इस्राएल घराण्याच्या सर्व अमंगळ दुष्कर्मांस धिक्कार असो; ते तरवार, दुष्काळ व मरी यांनीं मरतील. १२ जो दूर असेल तो मरीनें मरेल; जो जवळ असेल तो तरवारीनें पडेल; यांतूनहि जो निभावेल तो दुष्काळानें मरेल; अशी मी त्यांच्यावरल्या माझ्या संतापाची परिपूर्ति करीन. १३ प्रत्येक उंच टेकडीवर, सर्व डोंगरांच्या माथ्यांवर, प्रत्येक हिरव्या झाडाखालीं, प्रत्येक दाट पालवीच्या एला झाडाखालीं ज्या ज्या स्थळीं त्यांनीं आपल्या सर्व मूर्तींपुढें सुवासिक धूप अर्पिला, तेथल्या त्यांच्या मूर्तींच्या मध्यें त्यांच्या वेद्यांसभोवतीं त्यांचे वध पावलेले पडतील, तेव्हां तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर आहें. १४ मी आपला हात त्यांजवर उगारीन आणि त्यांच्या सर्व वसतिस्थानांतील भूमि दिब्लाकडच्या रानापेक्षां वैराण व ओसाड करीन; *तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.*

७ १ आणखी परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें: २ प्रभु परमेश्वर इस्राएल देशाला म्हणतो, हे मानवपुत्रा, अंत आला आहे, देशाचा चोहों बाजूंनीं अंत आला आहे. ३ आतां तुझा अंत आला आहे; मी आपला संताप तुजवर भडकवीन, तुझ्या करणीप्रमाणें तुझा न्याय करीन व तुझ्या सर्व अमंगळ कृत्यांचें प्रतिफळ तुला देईन. ४ मी तुजवर कृपादृष्टि करणार नाहीं, मी गय करणार नाहीं; तर तुझ्या करणीचें प्रतिफळ तुला देईन; तुझ्या अमंगळ कृत्यांचें प्रतिफळ तुजमध्यें दिसेल तेव्हां तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.

५ प्रभु परमेश्वर म्हणतो: पाहा, विपत्ति, अपूर्व विपत्ति येत आहे. ६ अंत आला आहे; आला आहे! तो तुजसाठीं जागृत झाला आहे; पाहा, तो येत आहे. ७ देशांतल्या रहिवाश्या, तुझी घडी भरली आहे; काळ आला आहे, दिवस समीप आला आहे; डोंगरावर हर्ष नव्हे तर कुमाकूळ होणार आहे. ८ आतां मी आपल्या संतप्त क्रोधाचा तुजवर सत्वर वर्षाव करीन, मी आपल्या क्रोधाची परिपूर्ति तुजवर करीन, तुझ्या आचरणाप्रमाणें तुझा न्याय करीन व तुझ्या सर्व अमंगळ कृत्यांचें प्रतिफळ तुला देईन. ९ मी तुजवर कृपादृष्टि करणार नाहीं; मी तुझी गय करणार नाहीं; तर तुझ्या आचरणाचें फळ तुला देईन, तुझ्या अमंगळ कृत्यांचें प्रतिफळ तुला देईन; तेव्हां तुला समजेल कीं मी परमेश्वर तुला मारणार आहें.

१० पाहा, तो दिवस! पाहा तो येत आहे! तुझा विनाशरूप रोपा उगवला आहे, तो फोफावून त्याचा दंड बनला आहे, तो गर्वानें फुलला आहे. ११ बलात्कार हा शासनदंड होऊन बसला आहे; त्या लोकांतला कोणीहि, त्यांच्या समूहापैकीं कोणीहि, त्यांच्या धनांतलें कांहींहि उरणार नाहीं; त्यांची कांहीं प्रतिष्ठा राहणार नाहीं. १२ समय आला आहे, दिवस समीप आला आहे; विकत घेणारा आनंद न करो, विकणारा खेद न पावो; कारण त्या सर्व समूहावर क्रोध येत आहे.

१३ विकणारा जीवंत राहिला तरी तो विकलेल्या भूमीला परत जावयाचा नाहीं, कारण हें भाकीत त्या सर्व समूहाविषयींचें आहे, त्यांतलें कांहींहि चुकणार नाहीं; कोणीहि आपल्या अधर्मानें आपल्या जीवितास बळकटी आणणार नाहीं.

१४ ते करणा वाजवितात, सर्व तयारी करितात, तरी कोणी युद्धास पुढें सरसावत नाहींत; कारण त्या समूहावर माझा कोप झाला आहे. १५ बाहेर तरवार, आंत मरी व दुष्काळ; शेतांत असलेला तरवारीनें मरेल. नगरांत असलेल्यास दुष्काळ व मरी हीं ग्रासून टाकतील. १६ त्यांतले कांहीं निभावतील ते निभावतील, पण ते सगळे खोऱ्यांतल्या पारव्यांप्रमाणें डोंगरांवर आपल्या अधर्मामुळें घुमत राहतील. १७ सर्वांचे हात ढिले पडतील; त्यांच्या गुडघ्यांचें पाणी होईल. १८ ते कमरेला गोणताट गुंडाळतील, दरारा त्यांस व्यापील; त्या सर्वांच्या मुखांवर लज्जा असेल व सर्वांचीं डोकीं भादरण्यांत येतील. १९ ते आपलें रुपें रस्त्यांवर फेकून देतील, त्यांस आपलें सोनें अमंगळ वाटेल; परमेश्वराच्या कोपाच्या दिवशीं त्यांच्या सोन्यारुप्यानें त्यांचा बचाव होणार नाहीं; त्यापासून त्यांच्या जिवाची तृप्ति होणार नाहीं, त्यांचें पोट भरणार नाहीं, कारण त्यांनीं त्यामुळें ठोकर खाऊन अधर्म केला आहे. २० त्यांनीं त्याचीं केलेलीं भूषणें दिमाख दाखविण्यासाठीं वापरिलीं; त्यांनीं त्याच्या अमंगळ मूर्ति व तिरस्करणीय वस्तु आपणांसाठीं बनविल्या; म्हणून तें त्यांस अमंगळ वस्तूसमान वाटावें असें मीं केलें आहे. २१ तें मी परदेशीयांस भक्ष्य म्हणून देईन; तें जगांतील दुष्टांस लूट म्हणून देईन; ते तें भ्रष्ट करितील. २२ मी आपलें तोंड त्यांच्यापासून फिरवीन, म्हणजे ते लोक माझें भांडार भ्रष्ट करितील; लुटारू त्यांत शिरून ते भ्रष्ट करितील. २३ बेडी तयार करा, कारण देश रक्तपाताच्या गुन्ह्यांनीं भरला आहे, नगर बलात्कारानें भरलें आहे. २४ म्हणून मी राष्ट्रांतले अधमाधम जन आणीन; ते त्यांचीं घरें वतन करितील; मी जबरदस्तांचा ताठा मोडीन; त्यांचीं पवित्रस्थानें भ्रष्ट होतील. २५ नाश येत आहे; ते शांति शोधितील, पण ती मुळीं नसावयाची. २६ नाशावर नाश येईल, अफवेवर अफवा उठेल; ते संदेष्ट्यास दृष्टांत पाहावयास सांगतील पण याजकांचें धर्मशास्त्रज्ञान व वडिलांचें मसलत देण्याचें सामर्थ्य हीं नष्ट होतील. २७ राजा शोक करील, सरदार दराऱ्यानें व्याप्त होईल, देशांतील लोकांचे हात थरथरतील; मी त्यांच्या आचाराप्रमाणें त्यांजशीं वर्तन करीन, त्यांच्या गुणदोषांप्रमाणें त्यांचा न्याय करीन; तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.

८ १ सहाव्या वर्षाच्या सहाव्या महिन्याच्या पंचमीस असें झालें कीं मी आपल्या घरीं बसलों होतों व यहूदाचे वडील मजसमोर बसले होते. तेव्हां तेथें प्रभु परमेश्वराचा वरदहस्त मजवर आला. २ मीं पाहिलें तों एक पुरुष असल्याचा[1] भास मला झाला; त्याच्या कमरेपासून खालीं अग्नीचा भास झाला व त्याच्या कमरेपासून वर तृणमण्याच्या तेजासारखा मला भास झाला. ३ त्यानें हाताच्या आकृतीचें कांहीं पुढें करून माझ्या डोक्यावरील एक बट धरिली, आणि आत्म्यानें आकाश व पृथ्वी यांच्या दरम्यान मला उचलून नेऊन दिव्यदृष्टीनें यरुशलेम येथें उत्तरेस असलेल्या आंतल्या अंगणाच्या दरवाजाजवळ आणिलें; तेथें ईर्ष्येस पेटविणाऱ्या मूर्तीचें आसन होतें. ४ मग पाहा, मीं खोऱ्यांत दृष्टांत पाहिला होता त्यासारखें इस्राएलाच्या देवाचें तेज येथें होतें. ५ तेव्हां तो मला म्हणाला, मानवपुत्रा, आपले डोळे वर करून उत्तर दिशेकडे पाहा. मीं उत्तरेकडे दृष्टि लाविली तों वेदीवेशीच्या उत्तरेस मंदिराच्या प्रवेशमार्गांत ही ईर्ष्येस पेटविणारी मूर्ति होती. ६ तो मला म्हणाला, मानवपुत्रा, ते काय करीत आहेत तें पाहतोस ना? मीं आपल्या पवित्रस्थानांतून दूर निघून जावें म्हणून असलीं अमंगळ कृत्यें इस्राएल घराणें येथें करीत आहे; याहूनहि अधिक अमंगळ कृत्यें तुझ्या दृष्टीस पडतील. ७ मग त्यानें मला अंगणाच्या प्रवेशमार्गांत आणिलें; मी

[1] पाठभेद : अग्नितुल्य प्रतिमा मला दिसली.

पाहिलें तों भिंतीला भोक पडलें होतें. ८ त्यानें मला
म्हटलें, मानवपुत्रा, भिंत खण; मीं भिंत खणिली तों
पाहा, एक दार लागलें. ९ तेव्हां तो मला म्हणाला,
येथें हे लोक कसलीं दुष्ट व अमंगळ कृत्यें करीत
आहेत तीं पाहा. १० मीं आंत जाऊन पाहिलें तों
सरपटणारे प्राणी, अमंगळ पशु व इस्राएल घराण्याच्या
सर्व मूर्ति यांचीं चित्रें भिंतींवर चोहोंकडे काढिलेलीं
होतीं. ११ त्यांच्यापुढें इस्राएल घराण्याच्या वडिलांतले
सत्तर पुरुष उभे असून त्यांजमध्यें याजन्या बिन शाफान
हा उभा होता; त्या प्रत्येक माणसाच्या हातीं धुपाटणें
होतें; तेथें धुपाच्या दाट धुराचा परिमळ वर जात
होता. १२ तो मला म्हणाला, मानवपुत्रा, इस्राएल
घराण्याचा प्रत्येक वडील आपल्या मूर्तिगृहांत अंधारा-
मध्यें काय करीत आहे हें तुला दिसतें ना? ते तर
म्हणतात कीं परमेश्वर आम्हांस पाहत नाहीं; परमेश्वरानें
देशाचा त्याग केला आहे. १३ तो मला म्हणाला, ते
यांहूनहि अधिक अमंगळ कृत्यें करीत आहेत, तीं
पुनरपि तुला दिसून येतील. १४ तेव्हां त्यानें मला
परमेश्वराच्या मंदिराच्या उत्तरेस असलेल्या दरवाजा-
जवळ आणिलें, तों तेथें स्त्रिया बसून तम्मुजासाठीं
शोक करीत होत्या. १५ तो मला म्हणाला, मानवपुत्रा,
तुला हें दिसतें ना? ह्यांहून अधिक अमंगळ गोष्टी तुझ्या
दृष्टीस पडतील. १६ तेव्हां त्यानें मला परमेश्वराच्या
मंदिराच्या आंतल्या अंगणांत नेलें, तों पाहा, परमे-
श्वराच्या मंदिराच्या द्वारीं देवडीच्या व वेदीच्या दरम्यान
सुमारें पंचवीस इसम परमेश्वराच्या मंदिराकडे
पाठ करून व पूर्वेकडे तोंड करून उभे होते; ते
पूर्वदिशेस सूर्याची उपासना करीत होते. १७ तो मला
म्हणाला, मानवपुत्रा, तुला हें दिसतें ना? यहूदाचें
घराणें येथें हीं अमंगळ कृत्यें करीत आहे, हें थोडें
झालें काय? देश जुलुमाच्या कृत्यांनीं भरून ते मला
पुनःपुनः संतापवितात; पाहा, ते आपल्या नाकास
डहाळी लावीत आहेत. १८ यामुळें मी संतापून
करावयाचें तें करीन, मी त्यांजवर कृपादृष्टि करणार
नाहीं; त्यांची गय करणार नाहीं; त्यांनीं मोठ्यानें
माझ्या कानीं आरोळी मारिली तरी मी त्यांचें
ऐकणार नाहीं.

९ १ मग त्यानें मला ऐकूं येईसें मोठ्यानें म्हटलें,
नगररक्षकहो, तुम्ही सगळे आपलीं विध्वंसक हत्यारें
हातीं घेऊन इकडे या. २ तेव्हां पाहा, उत्तरेकडील
वरच्या वेशीनें सहा पुरुष आपल्या हातीं विध्वंसक
हत्यारें घेऊन आले; त्यांजमध्यें शुभ्र तागाचें वस्त्र ल्यालेला
एक मनुष्य होता, त्याच्या कमरेनजीक कारकुनाची
दउत होती. ते आंत जाऊन पितळी वेदीजवळ उभे
राहिले. ३ करूबारूढ असलेल्या इस्राएलाच्या देवाचें
तेज तेथून निघून मंदिराच्या उंबरठ्यावर आलें;
आणि कमरेनजीक कारकुनाची दउत असलेल्या व शुभ्र
तागाचें वस्त्र ल्यालेल्या त्या मनुष्यास त्यानें हाक मारिली.
४ परमेश्वर त्याला म्हणाला, नगरामधून, यरुशलेमा-
मधून जाऊन जीं माणसें आपल्यांत होत असलेल्या
सर्व अमंगळ कृत्यांमुळें उसासे टाकून विलाप करीत
आहेत त्यांच्या कपाळावर चिन्ह कर. ५ मला ऐकूं येईसें
तो त्या बाकीच्यांस म्हणाला, त्याच्यामागून नगरांत जा
व संहार करा; कृपादृष्टि करूं नका; गय करूं नका;
६ वृद्ध, तरुण व कुमारी, मुलें व स्त्रिया यांची
निखालस कत्तल करा; पण ज्यांवर चिन्ह असेल
त्यांस स्पर्श करूं नका; माझ्या पवित्रस्थानापासून
आरंभ करा. तेव्हां मंदिरापुढें असलेल्या वडिलां-
पासून त्यांनीं आरंभ केला. ७ त्यानें त्यांस
म्हटलें, मंदिर भ्रष्ट करा; अंगणें वधिलेल्यांनीं
भरून टाका; चला, निघा; तेव्हां त्यांनीं जाऊन नगरांत
संहार चालविला; ८ त्यांनीं अशी कत्तल चालविली
असतां मी सुटलों तेव्हां मी उपडा पडून ओरडून
म्हणालों, हाय हाय! प्रभू परमेश्वरा, तूं यरुशलेमावर
आपल्या क्रोधाचा वर्षाव करून अवघ्या अवशिष्ट इस्रा-
एलांचा विध्वंस करिशील काय? ९ तेव्हां तो मला
म्हणाला, इस्राएल व यहूदा यांच्या घराण्याचा अधर्म
अत्यंत भारी आहे; देश रक्तपातानें भरला आहे; नगर
अन्यायानें भरलें आहे; कारण ते म्हणतात, परमेश्वरानें
देशाचा त्याग केला आहे, परमेश्वर पाहत नाहीं.

१० मी तर कृपादृष्टि करणार नाहीं, गय करणार नाहीं,
त्यांच्या आचाराचें प्रतिफळ त्यांच्या शिरीं लादीन.
११ तेव्हां पाहा, कमरेनजीक कारकुनाची दऊत अस-
लेल्या व शुभ्र तागाचें वस्त्र ल्यालेल्या त्या मनुष्यानें परत
येऊन कळविलें कीं तुझ्या आज्ञेप्रमाणें मीं केलें आहे.
१ मीं पाहिलें तों करूबांवरल्या छतावर
१० तृणमण्यासारिखें कांहीं दिसलें, तें सिंहासनाच्या
प्रतिमेसारिखें होतें. २ मग परमेश्वर तागाचें
वस्त्र ल्यालेल्या त्या मनुष्यास म्हणाला, करूबांखालीं
चाकांच्या मध्यें जाऊन करूबांच्या मधून इंगळांनीं आपली
ओंजळ भर व ते नगरावर विखर, तेव्हां तो माझ्या-
देखत गेला. ३ तो मनुष्य गेला तेव्हां करूब मंदिराच्या
उजवीकडे उभे होते आणि आंतलें अंगण मेघानें व्यापून
टाकिलें होतें. ४ परमेश्वराचें तेज करूबावरून निघून
मंदिराच्या उंबरठ्यावर आलें होतें; मंदिर मेघानें
व्यापिलें होतें व अंगण परमेश्वराच्या तेजाच्या प्रभेनें
भरून गेलें होतें. ५ करूबाच्या पंखांचा ध्वनि बाहेरच्या
अंगणांत ऐकूं जात होता; सर्वसमर्थ देवाच्या वाणी-
सारखा तो होता. ६ त्यानें शुभ्र तागाचें वस्त्र ल्यालेल्या
मनुष्यास आज्ञापून सांगितलें कीं त्या चाकांमधून,
करूबांच्या मधून, इंगळ घे; तेव्हां तो जाऊन चाकांच्या
बाजूस उभा राहिला. ७ मग त्या करूबांपैकीं
एकानें आपला हात लांबवून करूबांमधल्या
विस्तवास तो लाविला; त्यानें त्यांतून कांहीं इंगळ
घेऊन तागाचें वस्त्र ल्यालेल्या त्या मनुष्याच्या हातांत
दिले; तो ते घेऊन निघून गेला. ८ तेथें करूबांजवळ
त्यांच्या पंखांखालीं मनुष्याच्या हाताच्या आकृतीसारखें
कांहीं दृष्टीस पडलें. ९ मीं पाहिलें तों प्रत्येक करूबाच्या
बाजूस एक अशीं सगळ्या करूबांच्या बाजूस चार चाकें
होतीं; तीं चाकें वैडूर्यमण्यासारखीं दिसत होतीं.
१० दिसावयाला त्या चार चाकांचा डौल सारखा होता;
तीं जशीं काय चाकाआड चाक अशीं होतीं. ११ ते
चालत तेव्हां चारी दिशांपैकीं पाहिजे त्या दिशेस जात;
चालतांना वळत नसत; प्रत्येक मस्तकाच्या कोणत्याहि
रोखानें ते जात; चालतांना वळत नसत. १२ त्यांचें
सर्व शरीर, पाठ, हात, पंख व चार चाकें यांस सर्वत्र
डोळे होते. १३ चाकांस गरगर फिरणारीं चाकें असें
म्हटलेलें मीं ऐकलें. १४ त्या प्रत्येकास चार मुखें
होतीं; पहिलें मुख करूबाच्या मुखासारखें होतें, दुसरें
मनुष्याच्या मुखासारखें होतें, तिसरें सिंहाच्या मुखासारखें
होतें व चौथें गरुडाच्या मुखासारखें होतें. १५ ते करूब
उडून वर गेले; मीं खबार नदीच्या तीरीं पाहिला तो हा
प्राणी होय. १६ करूब चालले म्हणजे चाकें त्यांबरोबर
चालत आणि भूमीवरून उंच उडण्यासाठीं ते आपले
पंख उचलीत तेव्हां तीं चाकें वेगळीं होत नसत;
१७ ते थांबले म्हणजे तीं थांबत; ते वर उडाले म्हणजे
त्यांबरोबर तीं वर जात; कारण त्या प्राण्यांचा आत्मा
त्यांत होता.

१८ तेव्हां परमेश्वराचें तेज मंदिराच्या उंबरठ्या-
वरून निघून करूबांवर जाऊन राहिलें. १९ निघते-
वेळीं करूबांनीं आपले पंख उचलिले व ते माझ्यादेखत
भूमीवरून वर चढून गेले, त्यांबरोबर चाकेंहि गेलीं; ते
परमेश्वराच्या मंदिराच्या पूर्व द्वारापुढें थांबले; त्यांच्यावर
इस्राएलाच्या देवाचें तेज होतें. २० खबार नदीच्या
तीरीं मीं इस्राएलाच्या देवाच्या आसनाखालीं पाहिला
होता तो हा प्राणी होय; ते करूब आहेत हें मला
कळलें. २१ त्या प्रत्येकास चार मुखें होतीं व प्रत्येकास
चार पंख होते; त्यांच्या पंखांखालीं मनुष्याच्या
हातासारखी आकृति होती. २२ त्यांच्या चेहऱ्यांविषयीं
म्हणाल तर खबार नदीच्या तीरीं मीं पाहिलेल्या
चेहऱ्यांसारखेच ते होते, त्यांचीं स्वरूपें व ते स्वतः
तसेच होते; ते नीट आपल्यासमोर चालत.

१ मग आत्म्यानें मला उचलून घेऊन
११ परमेश्वराच्या मंदिराच्या पूर्वाभिमुख पूर्ववेशीकडे
आणिलें; तेव्हां पाहा, वेशीपुढें पंचवीस इसम
होते; त्यांच्यामध्यें याजन्या बिन अज्जूर, व पलट्या
बिन बनाया हे लोकनायक माझ्या दृष्टीस पडले. २ तो
मला म्हणाला, मानवपुत्रा, अधर्माची योजना करणारे
व या नगरांत अनिष्ट संकल्प करणारे पुरुष ते हेच;
३ ते म्हणतात, घरें बांधण्याची वेळ अद्यापि जवळ

आली नाहीं; हें नगर जणूं काय कढई व आम्ही
तींतलें मांस; ४ म्हणून त्यांजविरुद्ध संदेश दे, मानव-
पुत्रा, संदेश दे. ५ तेव्हां परमेश्वराचा आत्मा मजवर
उतरला; तो म्हणाला, असें म्हण : परमेश्वर म्हणतो, अहो
इस्राएल वंशजहो, तुम्हीं असेंअसें म्हटलें; तुमच्या
मनांत कायकाय येत आहे तें मी जाणतों. ६ तुम्ही या
नगरांत पुष्कळांस वधिलें, त्यांतले रस्ते प्रेतांनीं भरून
टाकिले. ७ ह्याकरितां प्रभु परमेश्वर म्हणतो, तुम्हीं या
नगरांत ज्यांना वधून टाकिलें, ते मांस आहेत, व हें
नगर कढई आहे; तुम्हांस तर त्यांतून बाहेर नेतील.
८ तुम्ही तरवारीस भितां; मी तुम्हांवर तरवार आणणार
असें प्रभु परमेश्वर म्हणतो. ९ मी तुम्हांस त्यांतून
बाहेर काढीन, तुम्हांस परदेशीयांच्या हातीं देईन व
तुम्हांस न्यायदंड करीन. १० तुम्ही तरवारीनें पडाल;
इस्राएलसीमेवर मी तुमचा न्याय करीन तेव्हां
तुम्हांला समजेल कीं मी परमेश्वर आहें. ११ हें नगर
तुम्हांस कढई होणार नाहीं व तुम्ही तींतलें मांसहि
होणार नाहीं; इस्राएलसीमेवर मी तुमचा न्याय करीन.
१२ तेव्हां तुम्हांला समजेल कीं मी परमेश्वर आहें;
कारण तुम्ही माझ्या नियमांप्रमाणें चालला नाहीं, माझे
निर्णय तुम्हीं पाळिले नाहींत, तर तुम्ही आपल्या
सभोवतीं असणाऱ्या राष्ट्रांच्या निर्णयांप्रमाणें वागलां.
१३ मी हा संदेश देत असतां असें झालें कीं पलट्या
बिन बनाया मेला. तेव्हां मी उपडा पडून मोठ्यानें
ओरडून म्हणालों, अहा प्रभू परमेश्वरा, तूं इस्राएली
अवशेषाचा पुरा अंत करितोस काय?

१४ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं १५ मानव-
पुत्रा जे यरुशलेमनिवासी, परमेश्वरापासून दूर राहा,
आम्हांलाच देश वतन मिळाला आहे, असें म्हणतात
ते तुझे भाऊबंद, तुझे भाऊबंदच, तुझे आप्तजन,
इस्राएलाचें सर्व घराणें आहेत; १६ ह्याकरितां असें म्हण:
प्रभु परमेश्वर म्हणतो कीं मीं त्यांस राष्ट्रांत दूर घालवून
देऊन देशोदेशीं पांगविलें आहे, तरी ज्या ज्या देशांत
ते गेले आहेत त्यांत मी त्यांस अल्पकाळ पवित्रस्थान
होईन. १७ यास्तव असें म्हण : प्रभु परमेश्वर म्हणतो
कीं मी तुम्हांस राष्ट्रांतून गोळा करून आणीन; ज्या ज्या
देशांत तुम्ही पांगलां आहां त्यांतून मी तुम्हांस जमा
करून घेईन; आणि इस्राएल देश तुम्हांस देईन. १८ ते
येथें येतील आणि येथल्या सर्व तिरस्करणीय व
अमंगळ वस्तु येथून काढून टाकितील. १९ मी त्यांस
एकच हृदय देईन; तुमच्यांत नवीन आत्मा घालीन; मी
त्यांच्या देहांतून पाषाणहृदय काढून टाकून त्यांस मांसमय
हृदय देईन; २० म्हणजे ते माझ्या नियमांस अनुसरून
चालतील, माझे निर्णय पाळून त्यांप्रमाणें वागतील; ते
माझे लोक होतील व मी त्यांचा देव होईन. २१ तरी
ज्यांचें मन त्यांच्या तिरस्करणीय व अमंगळ वस्तूंच्या
मनोरथास अनुसरतें त्यांच्या आचाराचें प्रतिफळ
त्यांच्याच शिरीं येईलसें मी करीन, असें प्रभु परमेश्वर
म्हणतो. २२ तेव्हां करूबांनीं आपले पंख उचलिले,
त्यांबरोबर चाकेंहि उचलली गेलीं आणि इस्राएलाच्या
देवाचें तेज त्यांच्यावर होतें. २३ मग परमेश्वराचें तेज
नगराच्या मध्यभागाहून वर चढून नगराच्या पूर्वेस
असलेल्या पर्वतावर राहिलें. २४ तेव्हां त्या आत्म्यानें
दृष्टांतांत मला उचलून घेऊन खास्दी देशांत धरून आणि-
लेल्या लोकांकडे आणिलें; आणि जो दृष्टांत मी पाहत
होतों तो माझ्या डोळ्याआड झाला. २५ मग परमे-
श्वरानें मला सांगितलेलीं सर्व वचनें, धरून आणिलेल्या
त्या लोकांस मीं सांगितलीं.

१ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
१२ २ मानवपुत्रा, तूं फितुरी घराण्यांत राहत आहेस,
त्यांस डोळे असून दिसत नाहीं, कान असून
ऐकूं येत नाहीं; कारण ते फितुरी घराण्यांतले आहेत.
३ ह्याकरितां हे मानवपुत्रा, तूं देशांतर करण्यास लागणारी
सामग्री सिद्ध कर, व भरदिवसां त्यांच्यादेखत निघून जा;
त्यांच्यादेखत आपलें ठिकाण सोडून दुसऱ्या ठिकाणीं जा;
न जाणो हें कदाचित् त्यांच्या लक्षांत येईल; ते तर बंड-
खोर घराण्यांतले आहेत. ४ देशांतरास जातांना सामग्री
बाहेर काढितात तसें तूं भरदिवसां त्यांच्यादेखत आपलें
सामानसुमान बाहेर काढ, व देशांतरास निघतात तसा
संध्याकाळीं त्यांच्यादेखत निघून जा. ५ त्यांच्यादेखत

तटास आरपार भोक पाड व त्यांतून आपलें सामान-
सुमान ने. ६ त्यांच्यादेखत तें खांद्यावर घे व अंधार
पडला म्हणजे तें घेऊन जा; तूं आपलें मुख झाक
म्हणजे भूमि तुला दिसावयाची नाहीं; कारण मीं तुला
इस्राएल घराण्यास चिन्हवत् नेमिलें आहे. ७ मला आज्ञा
झाली तसें मीं केलें; देशांतरास लागणारी सामग्री
नेतात तसें मीं भरदिवसां आपलें सामानसुमान बाहेर
काढिलें व संध्याकाळीं मीं तटास आरपार भोक पाडिलें;
अंधार पडला तेव्हां मीं सामान बाहेर नेलें व त्यांच्या-
देखत तें मीं खांद्यावर घेतलें. ८ सकाळीं परमेश्वराचें
वचन मला प्राप्त झालें कीं ९ मानवपुत्रा, तूं काय
करितोस, असें तुला त्या इस्राएल घराण्यानें, त्या फितुरी
घराण्यानें, म्हटलें ना? १० त्यांस सांग: प्रभु परमेश्वर
म्हणतो कीं हें देववचन यरुशलेमांतील अधिपतीस व
ज्या इस्राएल घराण्यांतले ते आहेत त्या सर्व घराण्याला
लागू आहे. ११ असें म्हण कीं मी तुम्हांस चिन्हवत्
आहें; मीं त्यांस करून दाखविलें तसेंच त्यांस घडेल;
ते हद्दपार होतील, बंदिवासांत जातील. १२ त्यांच्यां-
तला सरदार अंधार पडला असतां खांद्यावर सामान
घेऊन निघून जाईल; ते तट फोडून त्यांतून तें नेतील;
तो आपलें मुख झाकील म्हणजे त्याच्या डोळ्यांला भूमि
दिसावयाची नाहीं. १३ मी त्याजवर आपलें जाळें
टाकीन म्हणजे तो माझ्या पाशांत सांपडेल; मी त्यास
बाबेलास खास्द्यांच्या देशांत घेऊन जाईन; पण तो देश
त्याला दिसणार नाहीं व तो तेथेंच मरेल. १४ मी
त्याच्याभोवतालचे त्याचे सर्व साहाय्यकर्ते व त्याची सर्व
सेना यांची दाही दिशांस दाणादाण करीन, व मी
तरवार उपसून त्यांचा पिच्छा पुरवीन. १५ मी त्यांस
राष्ट्रांमध्यें परागंदा करीन, त्यांची देशोदेशीं पांगापांग
करीन, तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.
१६ तरी त्यांच्यांतल्या थोडक्यांस तरवार, दुष्काळ व
मरी यांपासून मी बचावीन; म्हणजे ते ज्या ज्या राष्ट्रांत
जातील तेथें आपल्या अमंगळ कृत्यांची कहाणी
सांगतील; तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.
१७ नंतर परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
१८ मानवपुत्रा, तूं थरथर कांपत अन्न खा;
कंपायमान व चिंतातुर होऊन पाणी पी; १९ आणि
या देशाच्या लोकांस सांग कीं प्रभु परमेश्वर इस्राएल
देशांतल्या यरुशलेमनिवासीयांविषयीं म्हणतो कीं ते
चिंतातुर होऊन अन्न खातील, भयचकित होऊन
पाणी पितील; कारण त्या देशाच्या सर्व रहिवाश्यांच्या
दुष्टतेमुळें त्याच्या भूमींतलें सर्व कांहीं नष्ट करून ती
ओसाड करण्यांत आली आहे. २० आबाद नगरें
उजाड होतील, भूमि ओसाड होईल, म्हणजे तुम्हांस
समजेल कीं मी परमेश्वर आहें.

२१ मग परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
मानवपुत्रा, २२ दिवस लांबत चालले आहेत, प्रत्येक
दृष्टांत निष्फळ होत आहे, हा जो प्रवाद इस्राएल देशांत
तुमच्या तोंडीं पडला आहे त्याचा अर्थ काय? २३ तर
त्यांस सांग: प्रभु परमेश्वर असें म्हणतो कीं मी ह्या
म्हणीचा प्रचार बंद करीन व ती ते इस्राएलांत पुनः
उच्चारणार नाहींत; त्यांस सांग कीं दिवस जवळ आले
आहेत व प्रत्येक दृष्टांत प्रत्ययास येण्याचा समय
जवळ आला आहे. २४ इस्राएल घराण्यांत यापुढें
निरर्थक दृष्टांत व खुष करणारा शकुन सांगणार नाहींत.
२५ कारण मी परमेश्वर आहें; मी बोलत आहें व मी
बोलतों तें वचन सिद्धीस जाईलच; त्याला इतःपर
विलंब लागणार नाहीं; कारण प्रभु परमेश्वर म्हणतो,
हे फितुरी घराण्या, मी तुमच्या काळीं वचन बोलेन
व तें पूर्ण करीन.

२६ परमेश्वराचें वचन पुनः मला प्राप्त झालें कीं
२ मानवपुत्रा, पाहा, इस्राएल घराणें म्हणत आहे कीं
त्यानें जो दृष्टांत पाहिला त्याला पुष्कळ अवधि आहे;
तो दूरच्या काळाविषयीं संदेश देत आहे. २८ याकरितां
त्यांस सांग: प्रभु परमेश्वर म्हणतो कीं माझ्या कोणत्याहि
वचनास विलंब लागणार नाहीं; मी बोलेन तें वचन
सिद्धीस जाईलच असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

१ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
१३ २ मानवपुत्रा, संदेश देणाऱ्या इस्राएलाच्या
संदेष्ट्यांविरुद्ध संदेश दे; जे आपल्या मनचाच

संदेश देतात त्यांस सांग, परमेश्वराचें वचन ऐका; ३ प्रभु
परमेश्वर म्हणतो, जे मूर्ख संदेष्टे दृष्टांत पाहिल्यावांचून
आपल्याच मनांतील संदेश देतात ते हायहाय करोत.
४ हे इस्राएला, तुझे संदेष्टे ओसाड जागीं असलेल्या
कोल्ह्यांसारखे झाले आहेत. ५ परमेश्वराच्या दिवशीं
युद्धाला तोंड देण्यास तुम्ही खिंडारांत उभे राहत नाहीं
आणि इस्राएल घराण्याचा तट तुम्ही नीट बांधून काढीत
नाहीं. ६ परमेश्वरानें त्यांस पाठविलें नसतां, ही
परमेश्वराची वाणी असें म्हणणारे पोकळ दृष्टांत व खोटा
शकुन पाहतात; आणि शकुनाप्रमाणें खरोखर घडेल
अशी आशा धरितात. ७ तुम्हीं निरर्थक दृष्टांत
पाहिला, खोटा शकुन सांगितला; आणि मी बोललों
नसतां हें परमेश्वराचें वचन असें तुम्ही म्हणतां,
अशी गोष्ट आहेना ?

८ ह्याकरितां प्रभु परमेश्वर म्हणतो, तुम्ही पोकळ गोष्टी
सांगतां व खोटे दृष्टांत पाहतां; तर पाहा, मी तुमचा
विरोध करीन असें प्रभु परमेश्वर म्हणतो. ९ निरर्थक
दृष्टांत पाहणाऱ्या व खोटे शकुन सांगणाऱ्या संदेष्ट्यांवर
माझा हात चालेल; माझ्या लोकांच्या मंडळांत त्यांचा
प्रवेश होणार नाहीं, इस्राएल घराण्याच्या नामावलींत
त्यांची नोंद व्हावयाची नाहीं, इस्राएल देशांत त्यांचें जाणें
होणार नाहीं; तेव्हां तुम्हांस समजेल कीं मी प्रभु परमेश्वर
आहें. १० ह्याचें कारण हेंच कीं त्यांनीं माझ्या लोकांस
बहकविलें आहे, शांति नसतां शांति आहे असें त्यांनीं
म्हटलें आहे; आणि माझे लोक तट बांधीत असतां,
पाहा, त्याला ते कच्चा चुना लिंपीत आहेत. ११ त्या
कच्चा चुना लिंपणाऱ्यांस म्हण, तट पडेल; जोराचा पाऊस
लागेल; अहो मोठ्या गारांनो, तुम्ही पडाल; तुफानी
वारा सुटेल; १२ पाहा, तो तट पडल्यावर तुम्हीं
लिंपलेला चुना कोठें आहे, असें लोक तुम्हांस म्हणणार
नाहींत काय ? १३ ह्याकरितां प्रभु परमेश्वर म्हणतो,
आपल्या संतापामुळें तुफानी वारा सुटेल असें मी करीन;
माझ्या कोपामुळें जोराचा पाऊस पडेल, नाश व्हावयासाठीं
माझ्या संतापामुळें मोठ्या गारा पडतील. १४ तुम्हीं
कच्चा चुना लिंपलेला तट मी पाडून जमीनदोस्त करीन,
म्हणजे त्याचा पाया उघडा पडेल; तट पडेल व तुम्ही
त्याबरोबर नष्ट व्हाल; तेव्हां तुम्हांस समजेल कीं मी
परमेश्वर आहें. १५ मी आपला संतापाचा कहर त्या
तटावर व त्यास कच्चा चुना लिंपणाऱ्यांवर गुदरवीन;
तेव्हां मी तुम्हांस म्हणेन, तट व त्याला कच्चा चुना
लिंपणारे नष्ट झाले आहेत. १६ ज्या संदेष्ट्यांनीं यरु-
शलेमाविषयीं संदेश दिला व शांति नसतां शांति आहे
असा दृष्टांत सांगितला, ते तुम्ही नष्ट झालां आहां,
असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

१७ आणखी हे मानवपुत्रा, आपल्याच मनांतील
संदेश देणाऱ्या तुझ्या लोकांच्या कन्यांकडे तोंड करून
त्यांच्याविरुद्ध संदेश दे. १८ त्यांस सांग : प्रभु परमेश्वर
म्हणतो, लोकांच्या प्राणांची पारध करावी म्हणून ज्या
तुम्हीं प्रत्येक कोपराला पट्ट्या शिवून लावितां, व निर-
निराळ्या उंचीच्या मनुष्यांच्या डोक्यांसाठीं जाळ्या
तयार करितां, त्या तुम्ही हायहाय म्हणाल. तुम्ही
माझ्या लोकांच्या प्राणांची पारध करितां, पण स्वतांच्या
प्राणांचा बचाव करितां. १९ लबाडीस कान देणाऱ्या
माझ्या लोकांस तुम्ही लबाडी सांगून, जे मरूं नयेत
त्यांस मारून व जे जगूं नयेत त्यांस बचावून मूठभर
जवासाठीं व भाकरीच्या तुकड्यासाठीं तुम्हीं माझ्या
लोकांसमोर माझा अवमान केला आहे. २० ह्याकरितां
प्रभु परमेश्वर म्हणतो, पाहा, ज्या पट्ट्या बांधून तुम्ही
पक्ष्यांप्रमाणें पारध करितां, त्यांची मी वाट लावीन; मी
तुमच्या बाहूंवरून त्या पट्ट्या फाडून काढीन आणि ज्या
आत्म्यांची तुम्ही पक्ष्यांप्रमाणें पारध करितां, त्यांस
मुक्त करीन. २१ तुमच्या जाळ्याहि मी फाडून टाकीन,
तुमच्या हातांतले माझे लोक मी सोडवीन; ते तुमच्या
हातीं यापुढें भक्ष्य होणार नाहींत; तेव्हां तुम्हांस सम-
जेल कीं मी परमेश्वर आहें. २२ कारण ज्या धार्मिकास
मीं दुखविलें नाहीं त्याचें मन तुम्ही खोटें बोलून दुख-
वितां, आणि दुष्टानें आपल्या कुमार्गापासून वळूं नये,
आपला जीव बचावूं नये असें तुम्ही त्याच्या
हाताला बळ देतां; २३ म्हणून यापुढें तुमचें निरर्थक
दृष्टांत पाहणें व तुमचें शकुन पाहणें बंद होईल; आणि

मी आपले लोक तुमच्या हातांतून सोडवीन; तेव्हां
तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.

१४ १ इस्राएलाच्या वडिलांपैकीं कित्येक मनुष्यें
मजकडे येऊन माझ्यासमोर बसलीं. २ तेव्हां
परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं ३ मानव-
पुत्रा, ह्या मनुष्यांनीं आपल्या हृदयांत आपल्या मूर्ति
वागविल्या आहेत; त्यांनीं आपलें पापजनक अडखळण
आपल्या नेत्रांसमोर ठेविलें आहे; अशा लोकांस मी
आपल्याला प्रश्न विचारूं देईन काय ? ४ ह्याकरितां
त्यांजशीं बोल; त्यांस सांग कीं प्रभु परमेश्वर म्हणतो,
इस्राएल घराण्यांतील जो कोणी आपल्या हृदयांत मूर्ति
वागवितो, आपलें पापजनक अडखळण आपल्या नेत्रां-
समोर ठेवितो आणि संदेष्ट्याकडे येतो त्यास माझें उत्तर
त्याच्या मूर्तींच्या संख्येच्या मानानें मिळेल; ५ येणेंकरून
मी इस्राएल घराण्याच्या हृदयास हात घालीन, कारण ते
सर्व आपल्या मूर्तींमुळें मला परके झाले आहेत.
६ यास्तव इस्राएल घराण्यास सांग, प्रभु परमेश्वर म्हणतो,
मागें फिरा, आपल्या मूर्तींपासून फिरा आणि आपल्या
सर्व अमंगळ कर्मांपासून तोंडें फिरवा. ७ इस्राएल
घराण्यांतला व इस्राएलांत वस्ती करून असलेल्या
उपऱ्यांतला जो कोणी मजपासून वियुक्त होऊन आपल्या
हृदयांत मूर्ति वागवितो, आपल्या पापाचें अडखळण
आपल्या नेत्रांसमोर ठेवितो व मला प्रश्न विचारण्या-
साठीं संदेष्ट्याकडे येतो, त्याला मी स्वतः मला योग्य
वाटेल तें उत्तर देईन; ८ मी त्याला विमुख होईन;
त्याला मी विस्मय, चिन्ह व जननिंदा यांचा विषय
करीन व त्याचा माझ्या लोकांतून उच्छेद करीन;
तेव्हां तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर आहें. ९ जर
कोणी संदेष्टा भ्रमांत पडून संदेश देत असला तर
समजावें कीं मींच त्याला भ्रमांत पाडिलें आहे;
मी आपला हात त्यावर उगारीन, व माझे लोक जे
इस्राएल त्यांतून त्याचा उच्छेद करीन. १० प्रश्न
करणाऱ्याचा जसा दोष तसाच त्या संदेष्ट्याचाहि
दोष; ते दोघे आपल्या दोषाचें फळ भोगितील;
११ म्हणजे इस्राएल घराणें मजपासून बहकून जाणार
नाहीं व आपल्या सर्व पातकांनीं आपणांस विटाळून
घेणार नाहीं; तर ते माझे लोक होतील व मी त्यांचा
देव होईन, असें परमेश्वर म्हणतो.
१२ मग परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
१३ मानवपुत्रा, एकाद्या देशानें विश्वासघात करून
मजविरुद्ध पातक केल्यास मी त्यावर आपला हात
चालवीन, त्याच्या अन्नाचा आधार तोडीन, देशांत
दुष्काळ पाडीन, आणि त्यांतून मनुष्य व पशु यांचा
उच्छेद करीन; १४ तेव्हां त्यांत नोहा, दानीएल व
ईयोब हे तिघे असले तरी फार झालें; ते आपल्या
धार्मिकतेमुळें आपला तेवढा जीव बचावितील असें
प्रभु परमेश्वर म्हणतो. १५ मी देशांत हिंस्र पशु धाडून
तो उद्ध्वस्त केला आणि त्या पशूंमुळें कोणी त्यांतून
जातयेत नाहीं इतका निर्जन तो केला; १६ तर प्रभु
परमेश्वर म्हणतो, माझ्या जीविताची शपथ, त्यांत ते
तिघे असले तरी त्यांस पुत्रांचा किंवा कन्यांचा बचाव
करतां येणार नाहीं, त्यांचा मात्र निभाव लागेल, पण
देश वैराण होईल. १७ मीं देशावर तरवार आणून
म्हटलें कीं, अगे तरवारी, देशावर फीर, आणि तिनें
मनुष्य व पशु यांचा संहार केला; १८ तर प्रभु परमेश्वर
म्हणतो, माझ्या जीविताची शपथ, त्यांत ते तिघे
असले तरी त्यांस पुत्रांचा किंवा कन्यांचा बचाव
करितां येणार नाहीं, त्यांचा कायतो निभाव लागेल.
१९ मीं त्या देशावर मरी पाठविली आणि
त्यांतून मनुष्य व पशु यांचा उच्छेद करण्यासाठीं
रक्ताच्या रूपानें माझ्या संतापाचा वर्षाव केला; २० तर
प्रभु परमेश्वर म्हणतो, माझ्या जीविताची शपथ, नोहा,
दानीएल व ईयोब हे त्यांत असले तरी त्यांस पुत्राचा
किंवा कन्येचा बचाव करितां येणार नाहीं; ते आपल्या
धार्मिकतेमुळें फार तर आपला जीव बांचवितील
२१ तर मग मी तरवार, दुष्काळ, हिंस्र पशु व मरी हीं
माझीं चारी उग्र शासनें यरुशलेमांतील मनुष्य व पशु
यांचा संहार करण्यास त्यावर पाठवीन, तेव्हां त्याचा
निभाव कसा लागेल, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.
२२ तरी पाहा, त्यांच्यांत अवशेष राहील; त्या अवशिष्ट

पुत्रांस व कन्यांस बाहेर आणितील; पाहा, तीं तुम्हांकडे
येतील; तुम्ही त्यांचे मार्ग व त्यांचीं कर्मे पाहाल; तेव्हां
मीं यरुशलेमावर आणिलेले अनर्थ, त्याजवर आणिलेले
सर्व प्रसंग यांविषयीं तुम्ही सांत्वन पावाल. २३ तुम्ही
त्यांचा मार्ग व त्यांचीं कर्मे पाहाल तेव्हां त्यामुळें तुमचें
सांत्वन होईल, आणि मीं जें त्याचें सर्व कांहीं केलें
आहे त्यांतलें कांहींहि विनाकारण केलें नाहीं हें तुम्हांस
समजेल, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

१ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
१५ २ मानवपुत्रा, सर्व वृक्षांत द्राक्षालतेची काय
श्रेष्ठता आहे? वनवृक्षांमध्यें जी द्राक्षांची फांदी
होती ती काय अधिक आहे? ३ तिचें लाकूड कोणी
कामास लावितो काय? भांडीं टांगून ठेवण्यासाठीं
तिच्या खुंट्या बनवितात काय? ४ पाहा, ती अग्नींत
सर्पण म्हणून टाकितात; अग्नीनें तिचीं दोन्ही टोकें
जाळिलीं व मधला भाग भस्म झाला तर ती कोणत्या
कामास येईल? ५ पाहा, ती शाबूत असतां कसल्याहि
कामीं पडत नाहीं, तर मग अग्नीनें जळून तिचा
कोळसा झाल्यावर ती कोणत्या कामीं पडणार?
६ याकरितां प्रभु परमेश्वर म्हणतो, मी वनवृक्षांतील
द्राक्षालता अग्नींत सर्पण म्हणून टाकितों त्याप्रमाणें
यरुशलेमनिवाश्यांस अग्नींत टाकीन. ७ मी त्यांस
विमुख होईन; ते अग्नींतून बाहेर पडले तरी अग्नि
त्यांस खाऊन टाकील; मी त्यांस विमुख होईन, तेव्हां
तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर आहें. ८ त्यांनीं
विश्वासघात केला आहे म्हणून मी देश वैराण करीन
असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

१ पुनः परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें
१६ कीं २ मानवपुत्रा, यरुशलेमेचीं अमंगळ कृत्यें
तिच्या लक्षांत आणून दे. ३ असें म्हण, प्रभु
परमेश्वर यरुशलेमेस म्हणतो, तुझें मूळ व उत्पत्ति हीं
कनान देशांतलीं आहेत; तुझा बाप अमोरी व तुझी
आई हित्तीण होती. ४ तुझ्या जन्माविषयीं म्हटलें तर
तूं जन्मलीस तेव्हां तुझा नाळ कापला नाहीं, तुला
पाण्यानें धुऊन स्वच्छ केलें नाहीं, तुझ्या अंगाला मीठ
चोपडलें नाहीं व तुला बाळंत्यांत गुंडाळलें नाहीं.
५ तुझी करुणा येऊन यांतलें कोणतेंहि करावें अशी
तुजवर कोणाची दयादृष्टि झाली नाहीं; तर तूं जन्मलीस
तेव्हां तुला अमंगळ समजून शेतांत टाकून दिलें होतें.
६ मीं तुजजवळून जातांना तुला आपल्या रक्तांत
लोळतांना पाहिलें, तेव्हां मी तुला म्हणालों, तूं आपल्या
रक्तांत लोळत आहेस तरी जीवंत राहा; असेंच मी तुला
म्हणालों. ७ शेतांतलें बीज वाढून सहस्रपट होतें तशी
मीं तुझी वृद्धि केली; तूं वाढून उंच झालीस, तूं अति
सुंदर झालीस, तुला ऊर फुटले, तुझे केस वाढले
तरी तूं उघडीनागडी होतीस. ८ मग तुजजवळून जातांना
मीं तुला पाहिलें, तों ती वेळ तुझ्या प्रेमविकासाची
होती; तेव्हां मीं तुजवर पदर घालून तुझी नग्नता
झांकिली; प्रभु परमेश्वर म्हणतो, तेव्हां मी शपथ वाहून
तुजबरोबर करार केला, तूं माझी झालीस. ९ मीं तुला
पाण्यानें न्हाऊं घातलें, तुजवरचें रक्त धुऊन काढिलें व
तुला तेलानें माखिलें. १० तुला वेलबुट्टीचीं वस्त्रें लेव-
विलीं, उत्तम चर्मी जोडा तुझ्या पायांत घातला,
तुझ्या मस्तकाला उत्तम तागाचें वस्त्र गुंडाळिलें, व तुला
रेशमी ओढणी पांघरविली. ११ मीं तुला दागिन्यांनीं
सजविलें, तुझ्या हातांत बांगड्या घातल्या व गळ्यांत
गळसरी घातली. १२ मीं तुझ्या नाकांत नथ घातली,
कानांत बाळ्या घातल्या, तुझ्या डोक्याला उत्तम शिरो-
भूषण घातलें. १३ तूं सोन्यारुप्यानें नटलीस; तुझा
पेहराव उत्तम ताग, रेशीम व जरतारी यांचा होता;
तुला भोजनास सपीठ, मध व तेल हीं असत; तूं अति
सुंदर होतीस व तूं राजवैभवाला पोहंचली होतीस.
१४ तुझ्या सौंदर्यामुळें तुझी कीर्ति राष्ट्रांत पसरली;
कारण मीं तुला दिलेल्या तेजानें तुझें सौंदर्य अप्रतिम
झालें, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

१५ तूं तर आपल्या सौंदर्यावर भरंवसा ठेवून
आपल्या कीर्तीच्या जोरावर शिंदळकी केली, आल्यागेल्या-
बरोबर शिंदळकीचा तूं सपाटा चालविला; तुझें सौंदर्य
त्यांस लुटावयास सांपडलें. १६ तूं आपलीं वस्त्रें घेऊन
रंगीबेरंगी उच्च स्थानें आपणासाठीं सजविलीं आणि कधीं

झाली नाहीं व पुनः कधीं व्हावयाची नाहीं अशी शिंद-
ळकी त्यांबर केली. १७ मीं दिलेल्या सोन्यारुप्याचे
शोभिवंत दागिने घेऊन तूं त्यांच्या पुरुषमूर्ति केल्या व
त्यांजबरोबर शिंदळकी केली; १८ तूं आपलीं वेलबुट्टीचीं
वस्त्रें घेऊन त्यांस लेववलीं; मीं दिलेल्या तेलाचा व
धुपाचा तूं त्यास नैवेद्य दाखविला. १९ मी भाकर,
सपीठ, तेल व मध हीं तुला देत असें व तुला चारीत
असें, तींहि तूं त्यापुढें सुगंध म्हणून अर्पीत असस;
हें असें घडत असे असें प्रभु परमेश्वर म्हणतो.
२० आणखी मजपासून तुला पुत्र व कन्या हीं झालीं,
तीं तूं घेऊन त्यांस खाऊन टाकण्यासाठीं बळी
म्हणून अर्पिलीं. या तुझ्या शिंदळक्या तुला
पुरेशा झाल्या नाहींत; २१ म्हणून तूं माझ्या पुत्रांस
वधून त्यांचा मूर्तींप्रीत्यर्थ अग्नींत होम केला काय ?
२२ हीं सर्व अमंगळ कृत्यें व शिंदळक्या करितांना तूं
लहानपणीं उघडीनागडी असून आपल्या रक्तांत
लोळत होतीस याची तुला कधीं आठवण झाली नाहीं.
२३ तूं हीं दुष्कर्में केल्यावर ( प्रभु परमेश्वर म्हणतो,
तुला धिक्कार असो ! तुला धिक्कार असो ! ) असें झालें
कीं २४ तूं आपणासाठीं कमानदार घर बांधिलें,
रस्त्यारस्त्यांवर तूं आपणासाठीं उंच स्थानें केलीं.
२५ तूं रस्त्यांच्या नाक्यानाक्यांवर आपलीं उंच स्थानें
बांधिलीं, आपलें सौंदर्य भ्रष्ट केलें, आल्यागेल्या
सर्वांपुढें आपले पाय पसरून मनस्वी शिंदळकी केली.
२६ मोठ्या शरीराचे तुझे शेजारी मिसरी लोक यांजबरोबर
तूं शिंदळकी केली; मला चिडविण्यासाठीं तूं मनस्वी
शिंदळकी केली. २७ तेव्हां पाहा, मीं आपला हात
तुजवर उगारून तुझें नित्याचें अन्न कमी केलें आणि
ज्यांना तुझें शिंदळकीचें वर्तन लज्जास्पद वाटतें त्या
तुझा द्वेष करणाऱ्या पलिष्ट्यांच्या कन्यांच्या स्वाधीन
तुला केलें. २८ तुझी तृप्ति म्हणून कधीं होत नाहीं,
याकरितां तूं अश्शूऱ्यांबरोबरहि शिंदळकी केली; हो,
त्यांजबरोबर तूं शिंदळकी केली तरीहि तुझी तृप्ति होईना.
२९ व्यापाऱ्यांचा म्हणजे खास्द्यांचा देश तेथपर्यंत तूं
मनस्वी शिंदळकी चालविली तरी त्यानेंहि तुझी तृप्ति
होईना. ३० प्रभु परमेश्वर म्हणतो, तूं स्वच्छंदी वेश्येच्या
कृतीप्रमाणें हें सर्व केलें; तेव्हां तुझें मन किती दुर्बळ
आहे ! ३१ नाक्यानाक्यांवर तूं आपलीं कमानदार
घरें बांधलीं, व रस्त्यारस्त्यांनीं उच्च स्थानें बांधिलीं; पण
तूं शिंदळकीच्या वेतनाची पर्वा केली नाहीं, यांत तूं
वेश्येची रीत सोडिली. ३२ तूं तर पतीला सोडून पर-
पुरुष घेणाऱ्या जारिणी स्त्रीप्रमाणें आहेस ! ३३ लोक
वेश्येस वेतन देतात पण तूं उलट आपल्या सर्व जारांस
वेतन देतेस ! त्यांनीं चोहोंकडून येऊन तुजबरोबर
शिंदळकी करावी म्हणून तूं त्यांस लालूच दाखवितेस.
३४ तुझ्या शिंदळकीची रीत इतर स्त्रियांच्या उलट
आहे; कोणी व्यभिचारी पुरुष तुझ्यामागून येत नाहीं,
तुला कोणी वेतन देत नाहीं, तर उलट तूं त्यांस वेतन
देतेस, हें तुझें वर्तन विपरीत आहे.

३५ याकरितां अगे वेश्ये, परमेश्वराचें वचन ऐक :
३६ प्रभु परमेश्वर म्हणतो, तूं आपला पैका उधळिला,
आपल्या जारांबरोबर शिंदळकी करून आपली लाज
दाखविली, तूं आपल्या मूर्तींशीं अमंगळ कृत्यें केलीं
आणि आपल्या मुलांचें रक्त त्यांस अर्पिलें; ३७ म्हणून
पाहा, ज्यांस तूं खुश केलें, प्रेमपात्र व द्वेषपात्र असे जे
तुझे सर्व जार, त्यांस मी चोहोंकडून तुजविरुद्ध जमा
करीन, त्यांजपुढें तुझी लाज उघडी करीन म्हणजे ते
तुझी सारी लाज पाहतील. ३८ जारिणी व रक्तपाती
स्त्रिया यांचा न्याय करावा तसा मी तुझा न्याय करीन
आणि क्रोधानें व ईर्ष्येनें मी तुझा रक्तपात करीन.
३९ मी तुला त्यांच्या हातीं देईन, म्हणजे ते तुझीं
कमानदार घरें उद्ध्वस्त करितील, तुझीं उच्च स्थानें
पाडून टाकितील; तुझीं वस्त्रें हिरावून घेऊन व तुझें
उंची जवाहीर काढून घेऊन तुला उघडीनागडी करून
सोडितील. ४० ते तुजविरुद्ध मंडळी जमवून आणून
तुला दगडमार करितील व आपल्या तरवारींनीं तुला
भोसकतील. ४१ ते तुझीं घरें अग्नीनें जाळितील
आणि बहुत स्त्रियांदेखत तुला शासन करितील; या

१ **मुळांत :** कनान

१ **अथवा :** आपली मलिनता उधळली.

प्रकारें तुझी शिंदळकी मी बंद करीन, आणि यापुढें तूं
कोणास वेतन देणार नाहींस. ४२ तेव्हां तुजवरचा
माझा संताप मी शांत करीन, तुजविषयींची माझी
ईर्ष्या नाहींशी होईल; मी शांत होईन, पुनः कोप करणार
नाहीं. ४३ तूं आपल्या तरुणपणाच्या दिवसांचें स्मरण
ठेविलें नाहीं, तर हें सर्व करून मला चिडविलें, म्हणून
पाहा, प्रभु परमेश्वर म्हणतो, तुझ्या अनाचाराचें प्रतिफळ
मी तुझ्या माथीं लादीन, म्हणजे आपल्या इतर सर्व
अमंगळ कर्मांत आणखी शिंदळकीची भर तूं घालणार
नाहींस.

४४ पाहा, म्हणी योजणारे सर्व, यथा माता तथा
कन्या, ही म्हण तुजविषयीं म्हणतील. ४५ आपल्या
नवऱ्याचा व मुलांचा धिक्कार करणारी तुझी माता
तिची तूं कन्या; आपल्या नवऱ्याचा व मुलांचा धिक्कार
करणाऱ्या तुझ्या बहिणी त्यांची तूं बहीण; तुझी आई
पडली हित्तीण व बाप पडला अमोरी. ४६ तुझ्या
डावीकडे आपल्या कन्यांसह राहणारी शोमरोन ती
तुझी थोरली बहीण आणि तुझ्या उजवीकडे आपल्या
कन्यांसह राहणारी सदोम ही तुझी धाकटी बहीण.
४७ तूं त्यांच्या मार्गांनीं व त्यांच्या अमंगळ कृत्यांप्रमाणें
थोडीथोडकी चाललीस असें नाहीं, तर तूं आपला सर्व
आचार त्यांच्यापेक्षांहि भ्रष्ट केला. ४८ प्रभु परमेश्वर
म्हणतो, माझ्या जीविताची शपथ, तूं व तुझ्या कन्यांनीं
जसें वर्तन केलें तसें तुझी बहीण सदोम हिनें व तिच्या
कन्यांनीं केलें नाहीं. ४९ पाहा, तुझी बहीण सदोम
हिचें पाप येणेंप्रमाणें होतें: गर्व, अन्नाची विपुलता व
ऐषआराम हीं तिला व तिच्या कन्यांला होतीं; दरिद्री व
गरजवंत यांस तिनें हात दिला नाहीं. ५० त्यांनीं उन्मत्त
होऊन माझ्यासमोर अमंगळ कृत्यें केलीं; तीं पाहून मीं
त्यांचा निःपात केला. ५१ शोमरोनेनें तर तुझ्याहून
अर्धेसुद्धां पाप केलें नाहीं. तूं आपलीं अमंगळ कृत्यें
त्यांच्याहून अधिक केलीं; तूं केलेल्या अमंगळ कृत्यांच्या
मानानें तुझ्या बहिणी निर्दोष ठरल्या. ५२ तूं आपल्या
बहिणीस आपल्याहून निर्दोष ठरविलें यांची तुला लज्जा
असो; तूं त्यांच्याहून घोर पाप केल्यामुळें तुझ्या
मानानें त्या निर्दोष मानिल्या पाहिजेत; तुझ्या बहिणी
अधिक नीतिमान् आहेत हें तूं दाखविलें, म्हणून तूं
फजीत व लज्जित हो. ५३ मीं सदोम व तिच्या
कन्या यांचा, आणि शोमरोन व तिच्या कन्या यांचा, व
त्यांच्यामध्यें तुझ्या धरून नेलेल्या लोकांचाहि
बंदिवास फिरवीन; ५४ म्हणजे तुला लज्जेचा कालिमा
लागेल, ज्या तुझ्या सर्व कृत्यांनीं त्यांच्या मनाला
समाधान प्राप्त झालें त्यांविषयीं तूं लज्जित होशील.
५५ तुझ्या बहिणी, सदोम व तिच्या कन्या आपली
पूर्वस्थिति पुनः पावतील; शोमरोन व तिच्या कन्या
आपली पूर्वस्थिति पुनः पावतील; तूं व तुझ्या कन्या
आपली पूर्वस्थिति पुनः पावाल. ५६ तूं आपल्या
तोऱ्यांत असतां, तुझी बहीण सदोम हिचें नांव देखील
तुझ्या तोंडीं नव्हतें; ५७ अरामी स्त्रिया व तिच्या
आसपासचे सर्व आणि तुला तुच्छ मानणाऱ्या पलिष्टी
स्त्रिया यांनीं तुझी अप्रतिष्ठा केली, त्या वेळेस तुझी
दुष्टता प्रगट झाली, तशी अद्याप प्रगट झाली नव्हती.
५८ तूं आपल्या दुष्कर्मांचे व अमंगळ कृत्यांचें फळ
भोगीत आहेस, असें परमेश्वर म्हणतो. ५९ प्रभु परमे-
श्वर म्हणतो, तूं स्वतः वाहिलेल्या शपथेस तुच्छ मानून
आपला करार मोडिला; तूं जसें केलें तसें मी तुझें करीन.
६० तरी मीं तुझ्या तारुण्यांत तुजबरोबर केलेला करार
स्मरून तुजबरोबर सर्वकाळचा करार करीन. ६१ तूं
आपल्या वडील बहिणी व आपल्या धाकट्या बहिणी
यांचा अंगीकार करिशील तेव्हां तूं आपलें आचरण
स्मरून लज्जित होशील, आणि त्या तुझ्याबरोबर केलेल्या
करारांतल्या नसल्या तरी त्या कन्या म्हणून देईन.
६२ मी तुजबरोबर आपला करार स्थापीत करीन तेव्हां
तुला समजेल कीं मी परमेश्वर आहें; ६३ तूं जें सर्व
केलें त्याची मी क्षमा करीन, म्हणजे मग तुला त्याचें
स्मरण होऊन तूं लज्जा पावशील आणि अप्रतिष्ठेमुळें
तूं पुनः आपलें तोंड उघडणार नाहींस, असें प्रभु
परमेश्वर म्हणतो.

१७ १ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
२ मानवपुत्रा, इस्राएल घराण्यास कोडें घाल, हा
दृष्टांत कथन कर; ३ त्यास असें सांग, प्रभु
परमेश्वर म्हणतो, मोठाल्या पंखांचा, लांब पिसाऱ्यांचा
व चित्रविचित्र पिसांनीं युक्त असा एक मोठा गरुड
लबानोन पर्वतावर आला; त्यानें गंधसरूची शेंड्याकडील
एक डहाळी तोडून घेतली; ४ त्यानें त्यांतली अगदीं
वरची डहाळी तोडून व्यापाऱ्यांच्या देशांत नेली व सौदा-
गरांच्या एका शहरांत लाविली. ५ त्यानें देशांतलें कांहीं
बीं घेऊन तें पिकाऊ जमिनींत पेरिलें, वाळुंज लावितात
तसें तें विपुल पाण्याजवळ लाविलें. ६ तें वाढून त्याची
आखुड पण पसरलेली अशी द्राक्षालता झाली; तिच्या फांद्या
त्या गरुडाकडे झुकलेल्या असून तिचीं मुळें त्याच्या-
खालीं गेलीं होतीं; ती वाढून मोठी द्राक्षी झाली; तीस
फांद्या फुटल्या व पाला आला. ७ दुसरा एक मोठा
गरुड होता, त्याला फार पिसें होतीं व मोठाले पंख होते;
पाहा, त्यानें लाविलेल्या वाफ्यांतून आपणास पाणी
मिळावें म्हणून त्या द्राक्षीनें आपलीं मुळें त्याकडे
वाकविलीं व आपल्या फांद्या त्याकडे झुकविल्या.
८ त्या रोप्यास फांद्या फुटून तो फळास यावा आणि
त्याची भव्य द्राक्षी व्हावी म्हणून तो एका सुपीक
मळ्यांत विपुल पाण्याजवळ लाविला होता. ९ प्रभु
परमेश्वर म्हणतो, सांग बरें, ती जीव धरील काय? ती
सुकून जावी म्हणून तिला मुळासकट उपटून तिचीं फळें
तोडून टाकणार नाहींत काय? तिची सर्व नवी पालवी
वाळून जाईल; तिचीं मुळें उपटून टाकावयाला मोठेंच
सामर्थ्य किंवा पुष्कळ लोक लागणार नाहींत. १० पाहा,
तिची लागवड झाली तरी ती जीव धरील काय? पूर्वे-
कडील वारा तिला लागला म्हणजे ती सुकणार नाहीं
काय? ती ज्या वाफ्यांत वाढली त्यांतच ती मरून
जाईल.

११ पुनः परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
१२ या बंडखोर घराण्यास सांग, या गोष्टी काय
आहेत हें तुम्हांस समजत नाहीं काय? त्यांस सांग कीं
पाहा, बाबेलच्या राजानें यरुशलेमास येऊन तिचा राजा
व तिचे सरदार यांस धरिलें व आपणाकडे बाबेल येथें
आणविलें; १३–१४ तेव्हां त्यानें राजवंशांतल्या एका
पुरुषास निवडून त्याजबरोबर करार केला व त्याजकडून
प्रतिज्ञा करविली; तें राष्ट्र नीच व्हावें, त्यानें आपलें
डोकें वर करूं नये, जर त्याचा करार त्यानें पाळिला तर
तें कायम राहावें, म्हणून त्यानें देशांतले सर्व कर्ते
पुरुषहि नेले; १५ पण त्यानें त्यांजविरुद्ध फितुरी
करून मिसर देशानें आपणांस घोडे व बहुत लोक द्यावे
म्हणून त्याजकडे आपले जासूद पाठविले. त्याला यश
मिळेल काय? ज्यानें अशी गोष्ट केली तो निभावेल
काय? त्यानें करार मोडला आहे तरी तो निभावेल
काय? १६ प्रभु परमेश्वर म्हणतो, माझ्या जीविताची
शपथ, ज्यानें त्याला राजा केलें, ज्याशीं केलेली
आणभाक त्यानें तुच्छ मानिली, ज्याचा करार त्यानें
मोडिला, त्या राजाच्या निवासस्थानीं, बाबेलांत तो
मरेल. १७ जेव्हां पुष्कळांचा फडशा उडविण्यासाठीं शत्रु
मोरचे लावतील व बुरूज बांधितील तेव्हां युद्धप्रसंगीं
फारोला मोठें सैन्य व बहुत लोक बरोबर घेऊन त्याची
कुमक करितां येणार नाहीं. १८ त्यानें शपथ तुच्छ
मानून करार मोडिला; पाहा, त्यानें हातावर हात
मारिला तरी त्यानें हें सर्व केलें; तो निभावणार
नाहींच. १९ वास्तव परमेश्वर म्हणतो, माझ्या जीविताची
शपथ, त्यानें माझी प्रतिज्ञा तुच्छ मानिली, त्यानें
माझा करार मोडिला याचें प्रतिफळ मी त्याच्या शिरीं
लादीन. २० मी आपलें जाळें त्याजवर टाकीन; तो
माझ्या पाशांत सांपडेल; मी त्यास बाबेलास नेईन;
त्यानें मजबरोबर केलेल्या विश्वासघातासंबंधानें तेथें मी
त्याची झडती घेईन. २१ त्याच्या सर्व सैन्यांतले
पळणारे तेवढे सर्व तरवारीनें पडतील; जे उरतील
यांची दशदिशांस दाणादाण होईल; तेव्हां तुम्हांस
समजेल कीं मी परमेश्वर हें बोललों आहें.

२२ प्रभु परमेश्वर म्हणतो, मी उंच गंधसरूच्या शेंड्या-
वरील एक डहाळी तोडून ती लावीन, त्याच्या अगदीं
वरच्या कोवळ्या फांद्यांतली एक घेऊन ती एका मोठ्या

१ मुळांत : कनान

उंच पर्वतावर लावीन; २३ मी इस्राएलाच्या उंच पर्वता-
वर ती लावीन; तिला फांद्या फुटतील, फळें येतील,
तिचा उत्तम गंधसरू होईल; म्हणजे मग त्याच्याखालीं
सर्व पक्षिकुळें राहतील; त्याच्या शाखांच्या छायेंत तीं
वस्ती करितील. २४ वनांतील सर्व वृक्षांस कळेल कीं मीं
परमेश्वरानें उंच वृक्षास नीच केलें आहे व नीचांस
उंच केलें आहे, हिरव्या झाडास सुकविलें आहे व
शुष्क झाडास फलद्रूप केलें आहे; मी परमेश्वर हें
बोललों आहें व मीं हें केलेंहि आहे.

१ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
१८ २ बापांनीं आंबट द्राक्षें खाल्लीं आणि मुलांचे
दांत आंबले, ही म्हण तुम्ही इस्राएल देशांत
वापरतां ती कां ? ३ प्रभु परमेश्वर म्हणतो, माझ्या
जीविताची शपथ, ही म्हण इस्राएलांत यापुढें तुम्हांला
वापरावयाची नाहीं. ४ पाहा, सर्व जीव माझे आहेत,
बापाचा जीव तसा पुत्राचा जीवहि माझा आहे;
जो जीवात्मा पाप करितो तो मरेल. ५ धार्मिक
मनुष्य कोण म्हणाल तर जो न्यायानें व धर्मानें
वागतो, ६ डोंगरांवर भोजन करीत नाहीं, इस्राएल-
घराण्याच्या मूर्तींकडे डोळे लावीत नाहीं, आपल्या
शेजाऱ्याच्या स्त्रीस भ्रष्ट करीत नाहीं, ऋतुमती
स्त्रीजवळ जात नाहीं, ७ कोणावर जुलूम करीत नाहीं,
कर्जदाराचें गहाण त्याला परत करितो, कोणास लुटीत
नाहीं, भुकेल्यास अन्न देतो व उघड्यास वस्त्र लेववितो,
८ वाढीदिढी करीत नाहीं, व्याज घेत नाहीं, वाइटा-
पासून आपला हात आवरितो, मनुष्यामनुष्यांत सत्य
निर्णय करितो, ९ माझ्या नियमांप्रमाणें चालतो, व
माझे निर्णय पाळून सत्यानें वागतो, तोच धार्मिक होय;
तो खात्रीनें वांचेल, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.
१० तरी पण त्याला बलात्कारी व खुनशी पुत्र झाला,
आणि बापानें ह्यांपैकीं कोणतेंहि काम केलें नसून पुत्रानें
त्यांतलें एक जरी काम केलें, ११ त्यानें डोंगरांवर
भोजन केलें, आपल्या शेजाऱ्याची स्त्री भ्रष्ट केली,
१२ लाचार व दुबळे यांजवर जुलूम केला, कोणास
लुटलें, कर्जदाराचें गहाण त्याला परत केलें नाहीं,
मूर्तींकडे पाहिलें, अमंगळ कृत्य केलें, १३ वाढी-
दिढी केली, व्याज घेतलें, तर असला मनुष्य वांचेल
काय ? तो वांचावयाचा नाहीं; त्यानें हीं सर्व अमंगळ
कृत्यें केलीं आहेत; तो खात्रीनें मरेल; त्यानें केलेला
रक्तपात त्याजवरच उलटेल. १४ पुनः पाहा, त्याला
असा मुलगा झाला कीं बाप जीं पातकें करतो तीं तो
पाहतो, तरी तीं पाहून तो स्वतः तशीं करीत नाहीं,
१५ तो डोंगरांवर भोजन करीत नाहीं, इस्राएल घराण्याच्या
मूर्तींकडे पाहत नाहीं, आपल्या शेजाऱ्याची स्त्री
भ्रष्ट करीत नाहीं, १६ कोणावर जुलूम करीत नाहीं,
कर्जदाराचें गहाण अडकवून ठेवीत नाहीं, कोणाला
लुटीत नाहीं, भुकेल्यास अन्न देतो व उघड्यास
वस्त्र लेववितो, १७ दीनाची हानि करण्यापासून आपला
हात आवरितो. वाढीदिढी करीत नाहीं, व्याज घेत
नाहीं, माझे निर्णय पाळितो, माझ्या नियमांप्रमाणें
चालतो, तो आपल्या बापाच्या अधर्मामुळें मरावयाचा
नाहीं, तो खात्रीनें वांचेल. १८ त्याच्या बापाविषयीं
म्हणाल तर त्यानें जुलूम केला, आपल्या भावाला लुटिलें
व आपल्या लोकांत अनाचार केला, म्हणून पाहा, तो
आपल्या अधर्मामुळें मरेल.

१९ तरी तुम्ही म्हणतां, बापाच्या दुष्कर्माचा भार
पुत्रानें कां वाहूं नये ? हें पाहा, मुलगा न्यायानें व धर्मानें
वागला, त्यानें माझे सर्व नियम पाळून त्याप्रमाणें वर्तन
केलें तर तो खात्रीनें वांचेल. २० जो जीवात्मा पाप
करील तोच मरेल; मुलगा बापाच्या पातकाचा भार वाह-
णार नाहीं, आणि बाप मुलग्याच्या पातकाचा भार वाहणार
नाहीं; धार्मिकाला त्याच्या धार्मिकतेचें फळ मिळेल; दुष्टाला
त्याच्या दुष्टतेचें फळ मिळेल. २१ तथापि दुष्टानें आपण
केलेल्या सर्व पापांपासून परावृत्त होऊन माझे सर्व नियम
पाळिले आणि तो नीतीनें व धर्मानें वागला तर तो खात्रीनें
वांचेल, मरावयाचा नाहीं. २२ त्यानें केलेले कोणतेहि
अपराध त्याच्या हिशेबीं धरिले जाणार नाहींत, त्यानें
केलेल्या धार्मिकतेमुळें तो वांचेल. २३ प्रभु परमेश्वर
म्हणतो, दुष्टाच्या मरणानें मला संतोष होतो काय ? त्यानें
आपले मार्ग सोडून देऊन वांचावें यानें मला संतोष

होतो ना ? २४ तरी पण धार्मिक आपली धार्मिकता
सोडून दुष्कर्म करूं लागला व अधार्मिकाच्या सर्व
अमंगळ आचारांप्रमाणें वागूं लागला, तर तो वांचावा
काय ? त्यानें केलेली सर्व धार्मिकता जमेस धरण्यांत
येणार नाहीं; त्यानें केलेला भ्रष्टाचार व त्यानें केलेलें
पाप यामुळें तो मरणार. २५ तरी तुम्ही म्हणतां, प्रभूचा
मार्ग न्याय्य नाहीं. हे इस्राएल घराण्या, ऐक; माझा
मार्ग न्याय्य नाहीं काय ? तुमचेच मार्ग न्याय्य नाहींत,
असें नव्हे काय ? २६ कोणी धार्मिक आपली धार्मिकता
सोडून दुष्कर्म करितो व त्यामुळें मरतो तर तो आपण
केलेल्या दुष्कर्मानेंच मरतो. २७ दुर्जन आपण केलेल्या
दुष्टाईपासून परावृत्त होऊन नीतीनें व धार्मिकतेनें
वागेल तर तो आपला जीव वांचवील. २८ तो आपण
केलेलीं सर्व पातकें लक्षांत आणून वळेल तर तो खात्रीनें
वांचेल, मरावयाचा नाहीं. २९ तथापि इस्राएल घराणें
म्हणतें, प्रभूचा मार्ग न्याय्य नाहीं. हे इस्राएल घराण्या,
माझे मार्ग न्याय्य नाहींत काय ? तुमचेच मार्ग
न्याय्य नाहींत, असें नव्हे काय ? ३० प्रभु परमेश्वर
म्हणतो, हे इस्राएल घराण्या, यास्तव मी तुम्हां प्रत्येकाचा
ज्याच्या त्याच्या मार्गांप्रमाणें न्याय करीन. तुम्ही परता,
आपल्या सर्व पातकांपासून मागें फिरा, म्हणजे
तुमचा अधर्म तुम्हांस अडथळा होणार नाहीं.
३१ तुम्ही आचरिलेले सर्व दुराचार टाकून द्या;
आपल्या ठायीं नवें हृदय व नवा आत्मा स्थापीत करा;
हे इस्राएल घराण्या, तुम्ही कां मरतां ? ३२ कारण
प्रभु परमेश्वर म्हणतो, मरणाऱ्याच्या मृत्यूनें मला
संतोष होत नाहीं; तर मागें फिरा व जीवंत राहा.

१९ १ आतां तूं इस्राएलाच्या सरदारांसाठीं
विलाप कर. २ तूं असें म्हण, तुझी आई कोण ?
ती सिंहीण होती, ती सिंहांमध्यें वसत होती;
तिनें तरुण सिंहांमध्यें आपल्या पेठ्यांचें संगोपन केलें.
३ तिनें आपल्या पेठ्यांपैकीं एकाला वाढविलें; तो
वाढून तरुण सिंह झाला व शिकार करावयास शिकला;
तो मनुष्य भक्षूं लागला. ४ राष्ट्रांनीं त्याच्याविषयीं
ऐकलें; त्यांनीं केलेल्या खळग्यांत तो अडकून पडला;
त्यांनीं त्याला वेसण घालून मिसर देशांत नेलें.
५ आपली आशा भग्न होऊन नष्ट झाली हें तिनें
पाहिलें तेव्हां तिनें आपला दुसरा एक पेटा घेऊन
त्याला वाढविलें आणि तारुण्यावस्थेस आणिलें. ६ तो
सिंहांमध्यें हिंडूंफिरूं लागला, तरुण सिंह झाला व
शिकार करण्यास शिकला; तो मनुष्यांना भक्षूं लागला.
७ त्यानें त्यांचे वाडे उद्ध्वस्त केले व त्यांचीं नगरें
उजाड केलीं; त्याच्या गर्जनेच्या शब्दानें देश व त्यांतील
सर्व कांहीं वैराण बनलें. ८ सभोवतालच्या निरनिराळ्या
प्रांतांतील राष्ट्रें त्यावर उठलीं; त्यांनीं त्यावर आपलें
जाळें टाकिलें; त्यांनीं केलेल्या खळग्यांत तो अडकून
पडला. ९ त्यांनीं त्याला वेसण घालून पिंजऱ्यांत कोंडिलें व
बाबेलाच्या राजाकडे नेलें; इस्राएलाच्या डोंगरावर त्याचा
शब्द पुनः ऐकूं येऊं नये म्हणून त्याला दुर्गांत टाकिलें.
१० तुझी आई तुझ्या आबादानींत जलाजवळ
लाविलेल्या द्राक्षीसारखी होती; जलाच्या विपुलतेनें ती
सफळ होऊन तिला पुष्कळ पांगोरे फुटले. ११ अधि-
पतींचीं राजवेत्रें होण्याजोगे तिला मजबूत धुमारे आले;
ती उंच वाढून तिनें मेघांस भेदिलें व तिच्या बहुत
शाखांसहित ती उंचीनें मोठी दिसत होती. १२ तेव्हां
तिजवर संताप होऊन तिला उपटून जमिनीवर पाडण्यांत
आलें; पूर्वेकडील वाऱ्यामुळें तिचीं फळें करपलीं; तिचे
मजबूत धुमारे मोडून वाळून गेले; अग्नीनें ते खाक केले;
१३ आतां तिला रानांत रुक्ष व निर्जल प्रदेशांत लाविलें
आहे. १४ तिच्या शाखांतील धुमाऱ्यांतून अग्नि
निघून त्यानें तिचीं फळें खाऊन टाकिलीं आहेत;
आतां अधिकार चालविण्याचा राजदंड होण्याजोगा
तिच्यावर मजबूत धुमारा एकहि राहिला नाहीं. हें
विलापगीत आहे व विलापासाठीं राहील.

२० १ सातव्या वर्षी पांचव्या महिन्यांत दशमीस
असें झालें कीं इस्राएलाचे कांहीं वडील
प्रश्न विचारण्यासाठीं येऊन माझ्यासमोर बसले.
२ तेव्हां परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं,
३ मानवपुत्रा, इस्राएलाच्या वडिलांबरोबर बोल; त्यांस
सांग, प्रभु परमेश्वर असें म्हणतो, तुम्ही मला प्रश्न

विचारावयास आलां काय ? प्रभु परमेश्वर म्हणतो,
माझ्या जीविताची शपथ, मी तुम्हांस मला प्रश्न विचारूं
देणार नाहीं. ४ तूं त्यांचा न्याय करूं नये काय ?
मानवपुत्रा, तूं त्यांचा न्याय करूं नये काय ? त्यांस
त्यांच्या वडिलांचीं अमंगळ कृत्यें विदित कर. ५ त्यांस
सांग प्रभु परमेश्वर म्हणतो, ज्या दिवशीं मीं इस्राएलास
निवडून घेतलें, याकोब वंशाकडे मीं हात उचलून
शपथ वाहिली, मिसर देशांत त्यांस मी प्रगट झालों,
हात उचलून त्यांस शपथपूर्वक म्हणालों कीं मी परमेश्वर
तुमचा देव आहें; ६ त्या दिवशीं मीं हात उचलून,
त्यांच्याबरोबर शपथ केली कीं, मी तुम्हांस मिसर देशांतून
काढून दुधामधाचे प्रवाह वाहत आहेत अशा तुम्हां-
साठीं पाहिलेल्या देशांत आणीन; तो देश सर्व देशांचा
मुकुटमणि होय; ७ तेव्हां मीं त्यांस म्हटलें, तुम्हीं सर्वांनीं
आपल्या दृष्टीला प्रिय अशा अमंगळ वस्तु फेकून द्याव्या
व मिसर देशाच्या मूर्तींनीं आपणांस विटाळ होऊं देऊं
नये; मी परमेश्वर तुमचा देव आहें. ८ तरी पण ते
माझ्याबरोबर फितुरी झाले व माझें ऐकेनात; त्यांच्या
दृष्टीला प्रिय अशा अमंगळ वस्तु त्यांतल्या कोणीं
फेकून दिल्या नाहींत; मिसर देशाच्या मूर्तिहि सोडून
दिल्या नाहींत; तेव्हां मिसर देशांत त्यांजवर माझ्या
क्रोधाची वृष्टि करावी, त्यांजवर माझा कोप पूर्ण करावा,
असें मीं म्हटलें. ९ तथापि माझ्या नामासाठीं, ज्या
राष्ट्रांमध्यें ते राहत होते त्यांच्या देखत माझ्या नामाचा
अपमान न व्हावा, म्हणून मीं हें कार्य केलें; मी त्यांस
मिसर देशांतून काढून त्या राष्ट्रांच्या देखत त्यांस प्रगट
झालों. १० मीं त्यांस मिसर देशांतून काढून रानांत
आणिलें. ११ मीं त्यांस आपले नियम लावून दिले;
माझे निर्णय त्यांस दाखवून दिले; हे जो कोणी
पाळील तो त्यायोगें वांचेल. १२ आणखी त्यांच्या-
मध्यें व माझ्यामध्यें चिन्ह होण्यास मीं त्यांस आपले
शब्बाथहि दिले; ते अशासाठीं कीं मीं परमेश्वरानें
त्यांस पवित्र केलें असें त्यांस समजावें. १३ तरी पण
रानांत इस्राएल घराणें मजवर फितुरी झालें; ज्यांच्या
पालनानें मनुष्य वांचतो, त्या माझ्या नियमांप्रमाणें ते
चालले नाहींत, माझे निर्णय त्यांनीं टाकून दिले व
माझे शब्बाथ फार भ्रष्ट केले; तेव्हां रानांत त्यांजवर
आपल्या क्रोधाची वृष्टि करून त्यांचा नाश करावा
असें मीं म्हटलें. १४ तथापि ज्या राष्ट्रांसमक्ष मीं त्यांस
बाहेर आणिलें त्यांच्यादेखत माझ्या नामाचा अपमान
न व्हावा म्हणून माझ्या नामासाठीं मीं अशी कृति
केली. १५ आणखी मीं हात उचलून रानांत अशी
शपथ घेतली कीं दुधामधाचे प्रवाह ज्यांत वाहत आहेत
व जो सर्व देशांचा मुकुटमणि आहे असा देश मीं
त्यांस दिला होता, त्यांत मी त्यांस आणणार नाहीं;
१६ कारण त्यांचें अंतःकरण त्यांच्या मूर्तीशीं जडल्या-
मुळें त्यांनीं माझे निर्णय टाकून दिले, ते माझ्या नियमां-
प्रमाणें चालले नाहींत, व त्यांनीं माझे शब्बाथ भ्रष्ट
केले. १७ तरी मीं त्यांजवर कृपादृष्टि करून त्यांची गय
केली, रानांत त्यांचा नाश केला नाहीं, त्यांचा पुरा
शेवट केला नाहीं, १८ तसेंच रानांत मी त्यांच्या
वंशजांस म्हणालों, तुम्ही आपल्या वडिलांच्या नियमां-
प्रमाणें चालूं नका, त्यांच्या निर्णयांला अनुसरूं नका, व
त्यांच्या मूर्तींनीं आपणांस विटाळूं नका; १९ मी परमेश्वर
तुमचा देव आहें; माझ्या नियमांस अनुसरून चाला,
माझे निर्णय पाळून त्यांप्रमाणें वर्ता; २० माझे शब्बाथ
पवित्र माना, म्हणजे ते तुम्हांमध्यें व मजमध्यें चिन्ह
होतील व तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर तुमचा देव
आहें. २१ तरी पण ते वंशजहि मजबरोबर फितुरी झाले;
जे पाळिल्यानें मनुष्य वांचतो त्या माझ्या नियमांप्रमाणें
ते चालले नाहींत; ते माझे निर्णय त्यांनीं टाकून दिले;
माझे शब्बाथ त्यांनीं भ्रष्ट केले; तेव्हां रानांत त्यांजवर
आपल्या क्रोधाची वृष्टि करून त्यांजवर माझा कोप पूर्ण
करावा असें मीं म्हटलें. २२ तथापि ज्या राष्ट्रांसमक्ष
मीं त्यांस बाहेर आणिलें त्यांच्यादेखत माझ्या
नामाचा अपमान न व्हावा म्हणून मीं आपला हात
आवरिला; माझ्या नामासाठीं अशी कृति मीं केली.
२३ आणखी त्यांची राष्ट्रांमध्यें पांगापांग करीन व त्यांस
देशोधडीस लावीन अशी प्रतिज्ञाहि मीं रानांत हात
उचलून केली; २४ कारण त्यांनीं माझे निर्णय

पाळिले नाहींत; माझे नियम टाकून दिले, माझे
शब्बाथ भ्रष्ट केले, व त्यांचे डोळे त्यांच्या वडिलांच्या
मूर्तींकडे लागले. २५ तेव्हां जे चांगले नाहींत असे
नियम मीं त्यांस दिले, ज्यांनीं ते जगावयाचे नाहींत
असे निर्णय त्यांस दिले. २६ मीं त्यांची नासधूस
केल्यानें त्यांस असें समजावें कीं मी परमेश्वर आहें; मीं
त्यांस त्यांच्या यज्ञार्पणांसंबंधानें असें भ्रष्ट केलें कीं त्यांनीं
गर्भाशयांतून प्रथम निघालेल्यांचा अग्नींत होम केला.

२७ यास्तव हे मानवपुत्रा, इस्राएल घराण्याबरोबर
बोल, आणि हें सांग: प्रभु परमेश्वर असें म्हणतो,
आणखी तुमच्या पूर्वजांनीं मजबरोबर विश्वासघात करून
माझा अपमान केला, तो असा: २८ मीं आपला हात
उचलून शपथ करून दिलेल्या देशांत त्यांस आणिलें
तेव्हां त्यांनीं प्रत्येक उंच टेकडी व प्रत्येक दाट छायेचा
वृक्ष पाहून तेथें आपले यज्ञबलि अर्पिले; तेथें संताप-
विण्याजोगीं अर्पणें त्यांनीं केलीं; तेथें त्यांनीं सुवासिक
धूप जाळिला व तेथेंच त्यांनीं आपलीं पेयार्पणेंहि
वाहिलीं. २९ तेव्हां मी त्यांस म्हणालों, तुम्ही ज्या
उंचवट्यावर जातां तो कसला आहे? आजवर त्याला
बामा (उंचवटा) असें म्हणत आले आहेत.
३० याकरितां इस्राएल घराण्यास सांग, प्रभु परमेश्वर
म्हणतो, काय? तुम्ही आपल्या वडिलांच्या मार्गास
लागून आपणांस विटाळवितां, व अनाचार करून त्यांच्या
अमंगळ वस्तूंच्या मागें लागतां, ३१ आणि आपलीं अर्पणें
वाहून व आपल्या पुत्रांचा अग्नींत होम करून आपल्या
सर्व मूर्तींच्या योगें आजवर आपणांस विटाळवीत आहां;
असें असतां मी तुम्हांस मला प्रश्न विचारूं देईन काय?
प्रभु परमेश्वर म्हणतो, माझ्या जीविताची शपथ, मी
तुम्हांस मला प्रश्न विचारूं देणार नाहींच. ३२ तुम्ही
म्हणतां, राष्ट्रांप्रमाणें, देशोदेशच्या लोकांप्रमाणें आम्ही
काष्ठपाषाणाची पूजा करूं; हे जे तुमच्या मनांत तरंग
उठतात ते सिद्धीस जावयाचे नाहींत. ३३ प्रभु परमेश्वर
म्हणतो, माझ्या जीविताची शपथ, मी प्रबल बाहूनें,
उगारिलेल्या हातानें व कोपवृष्टि करून तुम्हांवर राज्य
करीन; ३४ मी प्रबल बाहूनें, उगारिलेल्या हातानें व
कोपवृष्टि करून तुम्हांस राष्ट्रांतून आणीन, ज्या देशांत
तुमची पांगापांग झाली आहे त्यांतून तुम्हांस एकवट
करीन; ३५ आणि मी तुम्हांस राष्ट्रांच्या रानांत आणून तेथें
तुम्हांबरोबर समक्ष वाद करीन. ३६ मीं मिसर देशच्या
रानांत तुमच्या वडिलांबरोबर वाद केला तसा तुम्हां-
बरोबर वाद करीन, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.
३७ तुम्हांस काठीखालून चालवून करारानें बद्ध करीन;
३८ बंडखोर व मजबरोबर फितुरी करणारे यांस मी
तुम्हांपासून वेगळे करीन; ते अल्पकाल वस्ती करून आहेत
त्या देशांतून त्यांस बाहेर नेईन; पण इस्राएल देशांत
त्यांचें येणें होणार नाहीं, म्हणजे तुम्हांस समजेल कीं मी
परमेश्वर आहें. ३९ यास्तव प्रभु परमेश्वर असें म्हणतो,
हे इस्राएल घराण्या, जा, आपल्या हव्या त्या मूर्तींची
पूजा करा; पण पुढें तुम्ही खरोखर माझें ऐकाल, आणि
आपल्या अर्पणांनीं व मूर्तींनीं माझ्या पवित्र नामास बट्टा
लावणार नाहीं. ४० तर माझ्या पवित्र पर्वतावर,
इस्राएलाच्या उंच पर्वतावर, इस्राएलाचें सर्व घराणें,
त्यांतले सगळे जण, आपल्या देशांत माझी सेवा करितील,
असें प्रभु परमेश्वर म्हणतो; तेथें मी त्यांचा अंगीकार
करीन; तेथें तुम्हांजवळ अर्पणें, तुमचीं श्रेष्ठ अर्पणें,
समर्पिलेल्या सर्व वस्तु, मी मागेन. ४१ मी तुम्हांस
राष्ट्रांतून बाहेर आणीन व ज्या देशांत तुमची पांगापांग
झाली आहे त्यांतून तुम्हांस जमा करीन, तेव्हां मी
सुगंधाप्रमाणें तुमचा स्वीकार करीन, आणि तुमच्या
ठायीं माझी पवित्रता विदेशी राष्ट्रांस प्रगट होईल.
४२ जो इस्राएल देश मीं हात उचलून शपथ करून
तुमच्या वडिलांस दिला त्यांत मी तुम्हांस आणीन, तेव्हां
तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर आहें. ४३ ज्या
तुमच्या मार्गांनीं व ज्या तुमच्या सर्व कर्मांनीं तुम्ही
आपणांस विटाळविलें, त्यांचें स्मरण तुम्हांस होईल व
तुम्हीं जीं सर्व दुष्कर्में केलीं त्यामुळें तुम्ही स्वतांचा
वीट मानाल. ४४ हे इस्राएल घराण्या, प्रभु परमेश्वर
म्हणतो, तुमच्या कुमार्गांप्रमाणें, तुमच्या भ्रष्ट कृत्यांप्रमाणें
नव्हे, तर माझ्या नामासाठीं मी तुमच्यांत करणी
करीन, तेव्हां तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.

४५ परमेश्वराचें वचन पुनः मला प्राप्त झालें कीं
४६ मानवपुत्रा, दक्षिणेकडे आपलें तोंड कर, दक्षिणे-
कडे आपल्या वाणीचा ओघ वाहूं दे आणि दक्षिणेच्या
मैदानांतील वनाविषयीं संदेश दे. ४७ दक्षिणेंतील
वनास सांग, परमेश्वराचें वचन ऐक; प्रभु परमेश्वर
म्हणतो, पाहा, मी तुझ्यांत अग्नि पेटवीन, तो तुझ्यांतलें
प्रत्येक हिरवें झाड व प्रत्येक शुष्क झाड भस्म करील;
धगधगणारी ज्वाळा विझावयाची नाहीं आणि तिच्या योगें
दक्षिणोत्तर सर्व मुखें पोळतील. ४८ मीं परमेश्वरानें
तो अग्नि पेटविला आहे असें सर्व मानव समजतील; तो
विझावयाचा नाहीं. ४९ मी म्हणालों, अहा ! प्रभु परमे-
श्वरा ! लोक मजविषयीं म्हणतात, हा दृष्टांत सांगणारा
नव्हे काय ?

१ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
२१ २ मानवपुत्रा, यरुशलेमाकडे आपलें तोंड कर,
पवित्रस्थानाकडे आपल्या वाणीचा ओघ वाहूं
दे व इस्राएल देशाविरुद्ध संदेश दे; ३ इस्राएल देशास
सांग, परमेश्वर असें म्हणतो कीं पाहा, मी तुजविरुद्ध
आहें, मी आपली तरवार म्यानांतून उपसून तुझ्यांतले
धार्मिक व दुष्कर्मी यांस छेदून टाकीन. ४ मी तुझ्यां-
तले धार्मिक व दुष्कर्मी यांस छेदून टाकणार; यास्तव
माझी तरवार म्यानांतून निघून दक्षिणोत्तर सर्व मानव-
जातीवर चालेल; ५ तेव्हां सर्व मानवजातीला
समजेल कीं मीं परमेश्वरानें आपली तरवार म्यानांतून
उपसली आहे; ती पुनः त्यांत परत जावयाची नाहीं.
६ यास्तव हे मानवपुत्रा, कंबर मोडेल असा उसासा टाक,
त्यांजसमक्ष कष्टानें उसासा टाक; ७ आणि उसासा
कां टाकितोस असें तुला कोणी विचारतील तेव्हां त्यांस
सांग कीं, ही वार्ता प्रत्ययास येत आहे म्हणून; तेव्हां
सर्वांचीं मनें खचतील, सर्वांचे हात निर्बल होतील,
सर्वांचा उत्साह विरेल, सर्वांच्या गुडघ्यांचें पाणी
होईल; पाहा, ती प्रत्ययास येत आहे, तीप्रमाणें खास
घडणार, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.
८ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं ९ मानव-
पुत्रा, संदेश देऊन सांग; परमेश्वर असें म्हणतो,
तरवार, पाणी दिलेली, पाजविलेली तरवार ! १० वध
करावा म्हणून तिला पाणी दिलें आहे, ती विजेप्रमाणें
चमकावी म्हणून ती पाजविली आहे. माझ्या पुत्राचें
राजवेत्र सर्व देशांस तुच्छ लेखितें असें म्हणून आपण
आनंद करावा काय ? ११ ती हातीं धरावी म्हणून
पाजवावयास दिली आहे; तरवार वध करणाऱ्याच्या
हातीं द्यावी म्हणून तिला पाणी दिलें आहे, ती पाज-
विली आहे. १२ मानवपुत्रा, ओरड, आक्रंदन कर;
कारण ती माझ्या लोकांवर चालली आहे, ती इस्रा-
एलाच्या सर्व सरदारांवर चालली आहे; माझ्या
लोकांबरोबर तेहि तरवारीनें पडले आहेत, म्हणून
आपलें उर बडीव. १३ कारण त्याला कसोटीस
लाविलें आहे; आणि तुच्छ मानणारें राजवेत्र टिकलें
नाहीं तर कसें, असें प्रभु परमेश्वर म्हणतो. १४ मानव-
पुत्रा, तूं संदेश देऊन टाळी वाजीव म्हणजे तर-
वारीस, भोसकणाऱ्या तरवारीस, तिप्पट जोर येईल;
त्यांस घेरणारी तरवार थोरालाहि भोसकणारी होईल.
१५ त्यांचें हृदय गलित व्हावें, व त्यांचे पाय परा-
काष्ठेचे लटपटावे म्हणून मीं त्यांच्या सर्व वेशींवर घात
करणारी तरवार चालविली आहे; अहो ! ती विजे-
प्रमाणें चमकावी असें तिला केलें आहे, ती वधासाठीं
उपसली आहे. १६ अगे तरवारी, तुझें मुख जसें
फिरेल तशी तूं सावरून उजवीकडे वळ, डावीकडे
फीर. १७ मीहि टाळी वाजवून आपल्या कोपाची
पूर्तता करीन; मी परमेश्वर हें म्हणतों.
१८ परमेश्वराचें वचन पुनः मला प्राप्त झालें कीं
१९ मानवपुत्रा, बाबेलाच्या राजाची तरवार येण्या-
करितां दोन रस्ते आखून काढ; ते दोन्ही रस्ते
एकाच देशांतून निघावे; नगरांत जाणाऱ्या रस्त्याच्या
चवाठ्यावर मार्गदर्शक हाताची एक आकृति खोदून
काढ. २० अम्मोनपुत्रांचें राब्बा याजवर तरवार
येण्याचा एक रस्ता आणि यहूदांत जाऊन तटबंदी
केलेल्या यरुशलेमावर तरवार येण्याचा एक रस्ता
आखून काढ. २१ कारण बाबेलचा राजा चवाठ्यावर,

१ मुळांत : मांडी पीट.

दोन रस्ते फुटतात तेथें शकुन पाहण्यासाठीं थांबला
आहे; तो भात्यांतले बाण हालवून प्रश्न पाहत आहे,
तेराफीमांस कौल लावीत आहे, यज्ञपशूच्या काळजा-
वरून शकुन पाहत आहे. २२ त्याच्या उजवीस यरुश-
लेमाविषयीं शकुन निघाला; तो असा कीं आघातयंत्रें
लावावीं; मारा! हाणा! असे शब्द तोंडांतून काढावे;
सिंहनाद करावा, वेशींला आघातयंत्रें लावावीं; मोरचे
रचावे व बुरूज बांधावे. २३ इस्राएलाच्या दृष्टीनें हा
शकुन खोटा आहे, कारण त्यांच्याजवळ देवाचे
प्रतिज्ञापूर्वक करार आहेत; तरी तो त्यांस त्यांच्या
अधर्माचें स्मरण देऊन परक्याच्या स्वाधीन करितो.

२४ ह्यासाठीं प्रभु परमेश्वर म्हणतो, तुमचे अपराध
उघडकीस येऊन तुमच्या सर्व कृत्यांत तुमचीं पातकें
दिसून येतात; येणेंकरून तुम्हीच आपल्या स्वतःला
अधर्माचें स्मरण देतां; तुमचें स्मरण झालें आहे
म्हणून तुम्ही परक्यांच्या हातीं सांपडला आहां. २५ हे
जखमी झालेल्या पातक्या, इस्राएलाच्या सरदारा, तुझी
घटिका, तुझा पापजन्य अंतसमय येऊन ठेपला
आहे. २६ प्रभु परमेश्वर असें म्हणतो, शिरोभूषण
उतरीव, मुकुट काढून टाक; कांहींच कायम राहावयाचें
नाहीं; जें नीच तें उंच होईल आणि जें उंच तें
नीच होईल. २७ मी त्याचा विध्वंस करीन,
करीनच करीन; ही स्थिति अशीच राहावयाची नाहीं;
ज्याचा हक्क आहे तो आल्यावर त्यास मी सत्ता देईन.

२८ हे मानवपुत्रा, संदेश देऊन सांग, अम्मोनपुत्रां-
विषयीं व त्यांनीं केलेल्या निंदेविषयीं प्रभु परमेश्वर जें
म्हणतो तें सांग; तरवार, वधासाठीं तरवार उपसली
आहे, फन्ना उडविण्यासाठीं, चमकण्यासाठीं ती पाज-
विली आहे. २९ ते तुजपुढें कपटाचा संदेश देत
असतां, तुला खोटा शकुन सांगत असतां, ज्या जखमी
झालेल्या पातक्यांचा पापजन्य अंतसमय येऊन ठेपला
आहे त्यांच्या कापलेल्या मानांवर ती तरवार तुला
लोळवील. ३० ती पुनः म्यानांत घाल. जेथें तूं
निर्माण झालास त्या तुझ्या जन्मभूमीवर मी तुझा
न्याय करीन. ३१ मी आपल्या कोपाचा वर्षाव तुजवर
करीन, माझ्या कोपाग्नीचा मी तुजवर फुंकर घालीन
आणि राक्षसी व नाश करण्यांत कुशल अशा मनुष्यांच्या
हातीं मी तुला देईन. ३२ तूं अग्नीला भक्ष्य होशील;
तुझें रक्त देशांत पडून राहील; तुझी पुढें आठवण
राहणार नाहीं; कारण मी परमेश्वर हें बोललों आहें.

२२ १ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं,
२ मानवपुत्रा, तूं न्याय करिशील ना? त्या खुनी
नगरीचा न्याय करिशील ना? त्या वेळीं तिला
तिचीं सर्व अमंगळ कृत्यें दाखीव. ३ तिला सांग, प्रभु
परमेश्वर म्हणतो, अगे नगरी, तुझा काळ येऊन ठेपावा
म्हणून तूं आपल्यामध्यें रक्तपात करित्येस, व आपणास
विटाळण्यासाठीं मूर्ति करित्येस. ४ स्वतः पाडिलेल्या
रक्तानें तूं आपणास दोषी केलें, तूं केलेल्या मूर्तींनीं
आपणास विटाळविलें, तूं आपला काळ समीप
आणिला, तुझीं वर्षें भरलीं आहेत; म्हणून मी तुला
राष्ट्रांच्या निंदेस, सर्व देशांच्या थट्टेस पात्र करीन.
५ तूं अभद्र नांवाची व बेबंदपणानें भरलेली नगरी
आहेस असें म्हणून जवळचे व दूरचे तुझा उपहास
करितील. ६ पाहा, इस्राएलाचे सर्व सरदार
आपआपल्या बाहुबलाप्रमाणें रक्तपात करण्यास तुझ्यांत
राहिले आहेत. ७ तुझ्या ठायीं लोक आईबापांस तुच्छ
मानितात, तुझ्या ठायीं ते परदेशीयांवर जुलूम करितात,
तुझ्या ठायीं ते अनाथ व विधवा यांस जाचितात. ८ तूं
माझ्या पवित्र वस्तूंस तुच्छ लेखित्येस, तूं माझे शब्बाथ
अपवित्र लेखिले आहेत. ९ तुझ्यांत रक्तपात करण्या-
साठीं निंदक राहत आहेत, ते तुझ्यांतल्या डोंगरांवर
मेजवानी करितात; तुझ्यांत बदफैलीनें चालतात.
१० तुझ्यांत ते बापाची काया उघडी करितात, रजस्वला
स्त्री दूर बसली असतां तिजबरोबर गमन करितात.
११ तुझ्या ठायीं कोणी आपल्या शेजाऱ्याच्या स्त्रीबरोबर
अघोर कर्म करितो, कोणी आपल्या सुनेबरोबर
अगम्यागमन करून तिला भ्रष्ट करितो, कोणी आपल्या
बहिणीस, आपल्या बापाच्या कन्येस भ्रष्ट करितो,
१२ तुझ्या ठायीं रक्तपात करावा म्हणून ते लाच

१ गृहदेवतांस

घेतात; तूं व्याजबट्टा करित्येस, जुलूम करून आपल्या
शेजाऱ्यांस नागवित्येस व मला विसरली आहेस;
असें प्रभु परमेश्वर म्हणतो. १३ ह्यास्तव पाहा,
तूं अन्यायानें केलेल्या कमाईमुळें, आणि तुझ्यांतल्या
रक्तपातामुळें मी आपला हात आपटील आहें. १४ मी
तुझा समाचार घेईन त्या दिवशीं तुझें हृदय टिकाव
धरील काय? तुझे हात दृढ राहतील काय? मी
परमेश्वर हें जें बोललों आहें तें मी करीनच. १५ मी
राष्ट्रांमध्यें तुझी पांगापांग करीन, देशोदेशीं तुझी
दाणादाण करीन व तुझ्यांतली अशुद्धता नष्ट करीन.
१६ तूं राष्ट्रांदेखत आपल्याच कृतीनें अपवित्र ठरशील;
तेव्हां तुला समजेल कीं मी परमेश्वर आहें.

१७ परमेश्वराचें वचन पुनः मला प्राप्त झालें कीं
१८ मानवपुत्रा, इस्राएल घराणें माझ्या दृष्टीनें केवळ
गाळ झालें आहे; भट्टींतील पितळ, कथील, लोखंड व
शिसें यांसारखे ते सर्व आहेत; ते रुप्यांतील गाळ झाले
आहेत. १९ यास्तव प्रभु परमेश्वर म्हणतो, तुम्ही सर्व
गाळ झालां आहां; म्हणून पाहा, मी तुम्हांस यरुश-
लेमांत एकत्र करीन. २० रुपें, पितळ, लोखंड, शिसें
व कथील लोक भट्टींत घालितात व तीं वितळविण्यासाठीं
अग्नि फुंकून प्रदीप्त करितात, त्याप्रमाणें मी आपल्या
क्रोधानें व संतापानें तुम्हांस जमा करीन व भट्टींत
घालून वितळवीन. २१ मी तुम्हांस जमा करून
माझ्या कोपाग्नीचा फुंकर तुम्हांवर घालीन, तेणें-
करून तुम्ही भट्टींत वितळून जाल. २२ रुपें भट्टींत
वितळतें तसें तुम्ही यरुशलेमांत वितळून जाल, तेव्हां
तुम्हांस समजेल कीं मीं परमेश्वरानें आपला संताप
तुम्हांवर ओतिला आहे.

२३ मग परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
२४ मानवपुत्रा, या भूमीस सांग, क्रोधदिनीं शुद्धि न
पावलेली व पर्जन्यवृष्टि न झालेली भूमि तूं आहेस.
२५ तिच्यांत संदेष्ट्यांनीं एकोपा केला आहे; भक्ष्य
फाडून खाणाऱ्या गर्जणाऱ्या सिंहाप्रमाणें ते लोकांचे प्राण
ग्रासून टाकितात; ते धन व पैका हरण करितात; ते
तिच्या विधवांची संख्या वाढवितात. २६ तिचे याजक
माझ्या धर्मशास्त्राचें उल्लंघन करून माझ्या पवित्र वस्तु भ्रष्ट
करितात; पवित्र व अपवित्र यांचा ते कांहीं भेद ठेवीत
नाहींत; शुद्ध व अशुद्ध यांचा फरक ते शिकवीत नाहींत;
ते माझ्या शब्बाथाविषयीं डोळेझाक करितात; त्यांच्या-
मध्यें माझा अपमान होतो. २७ तिच्यांतले सरदार
भक्ष्य फाडून खाणाऱ्या लांडग्यांसारखे आहेत; ते
अन्यायानें कमाई करण्यासाठीं रक्तपात करितात,
मानवी प्राण्यांचा विनाश करितात. २८ तिचे संदेष्टे
कच्चा चुना त्यांच्याकरितां वापरितात; मिथ्या दृष्टांत
पाहून ते त्यांस खोटे शकुन सांगतात व परमेश्वर
बोलला नसतांहि प्रभु परमेश्वर म्हणतो, असें ते बोलतात;
२९ देशांतील लोक बलात्कार व चोरी करितात.
ते दुर्बळ व दरिद्री यांस चिरडून टाकितात आणि
परदेशीयांचा अन्याय व जुलूम करितात. ३० मीं
भूमीचा नाश करूं नये म्हणून तिच्यांतला कोणी तट
बांधील, कोणी मजसमोर देशासाठीं तटाच्या खिंडींत
उभा राहील कीं काय याची मीं वाट पाहिली, पण
कोणी मला आढळला नाहीं. ३१ ह्यामुळें त्यांजवर मी
आपल्या क्रोधाचा वर्षाव करीन; मी आपल्या कोपाग्नीनें
त्यांस भस्म करीन, त्यांच्या आचाराचें प्रतिफळ त्यांच्याच
शिरीं आणीन असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

२३ १ परमेश्वराचें वचन पुनः मला प्राप्त
झालें तें असें: २ मानवपुत्रा, दोन स्त्रिया होत्या,
त्या एकाच मातेच्या कन्या होत्या; ३ त्यांनीं
मिसर देशांत व्यभिचार केला; त्यांनीं आपल्या तारुण्यांत
व्यभिचार केला; तेथें त्यांचीं स्तनें मर्दण्यांत आलीं;
पुरुषांनीं त्यांच्या कौमार्यावस्थेंतील त्यांचीं स्तनाग्रें चुरिलीं.
४ त्यांतल्या थोरलीचें नांव अहला होतें व तिच्या
बहिणीचें नांव अहलीबा होतें; त्या माझ्या झाल्या
आणि त्यांस पुत्र व कन्या झाल्या. त्यांचीं नांवें पाहिलीं
असतां अहला (तिचा डेरा) म्हणजे शोमरोन व
अहलीबा (माझा डेरा तिच्या ठायीं आहे) म्हणजे
यरुशलेम. ५ अहला माझी असतां तिनें शिंदळकी
केली; ती आपले जार, आपले शेजारी अश्शूरी यांजवर
आसक्त झाली; ६ ते निळीं वस्त्रें धारण करणारे होते,

ते अधिपति व नायब अधिपति होते, ते सगळे
मनोहर व तरुण असून शिलेदार होते. ७ ते
सगळे निवडक अश्शुरी पुरुष असून त्यांच्याबरोबर
ती शिंदळकी करूं लागली, आणि ज्या सर्वांवर ती
आसक्त झाली त्यांच्या सर्व मूर्तींनीं ती भ्रष्ट झाली.
८ मिसर देशांतील आपली शिंदळकी तिनें सोडून दिली
नाहीं; तेथल्या पुरुषांनीं तिच्या तारुण्यांत तिजबरोबर
गमन केलें; त्यांनीं तिचीं कौमार्यावस्थेंतील स्तनाग्रें चुरलीं
व तिजबरोबर मनसोक्त व्यभिचार केला. ९ ह्यामुळें
मीं तिला तिच्या जारांच्या स्वाधीन केलें, ज्या अश्शुरी
पुरुषांवर ती आसक्त झाली होती त्यांच्या हातीं तिला
दिलें. १० त्यांनीं तिला नग्न केलें, तिचे पुत्र व कन्या
यांचें हरण केलें, तिला तरवारीनें मारून टाकिलें; तिचें
नांव स्त्रियांच्या तोंडीं झालें; कारण त्यांनीं तिला
शासन केलें. ११ तिची बहीण अहलीबा हिनें हें
पाहिलें तरी तिच्यापेक्षांहि तिची विषयासक्ति वाढली;
तिनें आपल्या बहिणीच्यापेक्षां अधिक व्यभिचार केला.
१२ शेजारचे अश्शुरी पुरुष अधिपति व नायब अधि-
पति, व उंची वस्त्रें ल्यालेले शिलेदार होते; त्या
सर्व मनोहर तरुणांवर ती आसक्त झाली. १३ मीं
पाहिलें कीं तीहि भ्रष्ट झाली; त्या दोघींचें वर्तन
सारखेंच होतें. १४ तिनें आपल्या व्यभिचाराचें क्षेत्र
वाढविलें; तिनें भिंतीवर रेखिलेलीं पुरुषांचीं चित्रें
पाहिलीं, तीं हिंगुळानें रेखिलेलीं खास्द्यांचीं चित्रें होतीं;
१५ त्यांच्या कमरांस पट्टे असून डोक्यांत उंची व रंगीत
पागोटीं होतीं; ते सर्व पुरुष वीरांप्रमाणें दिसत
असून त्यांची ढब खास्दी देशांतील बाबेलाच्या पुरुषां-
प्रमाणें होती; या पुरुषांची जन्मभूमि खास्दी देश होती.
१६ तिची नजर त्यांजवर गेली तेव्हां ती त्यांजवर
आसक्त झाली व तिनें त्यांस बोलावून आणावयास
खास्दी देशांत जासूद पाठविले. १७ तेव्हां बाबेलाचे
पुरुष तिच्या शृंगारलेल्या पलंगावर तिच्याजवळ गेले;
त्यांनीं तिजबरोबर व्यभिचार करून तिला भ्रष्ट केलें;
त्यांच्या समागमानें ती भ्रष्ट झाली, तेव्हां तिनें आपलें
मन त्यांजवरून काढिलें. १८ असा तिनें आपला व्यभि-
चार मांडिला व आपली काया उघडी केली; तेव्हां
जसें तिच्या बहिणीवरून माझें मन उडालें होतें तसें
तिजवरूनहि उडालें. १९ तरी तिनें आपल्या तारुण्यांत
मिसर देशांत वेश्यावृत्ति चालविली होती, तिची तिला
आठवण होऊन तिनें आपला व्यभिचार अधिकच
वाढविला. २० ती आपल्या जारांवर आसक्त झाली; त्यांचे
अवयव तर गाढवाच्या अवयवांसारखे होते व त्यांचा
माज घोड्यांच्या माजासारिखा होता. २१ या प्रकारें
तुझ्या तारुण्यांत मिसरी पुरुष तुझीं कौमार्यदशेंतील
स्तनाग्रें चुरीत तेव्हांच्या शिंदळकीची तूं आठवण केली.
२२ ह्यामुळें, अगे अहलीबे, प्रभु परमेश्वर म्हणतो,
पाहा, ज्या तुझ्या जारांवरून तुझें मन उडालें आहे
त्यांला मी तुजविरुद्ध उठवीन, त्यांस तुजवर चोहोंकडून
आणीन; २३ बाबेलाचे पुरुष, सर्व खास्दी, पकोद,
शोआ व कोआ येथले लोक व अश्शुरी पुरुष,
जे सर्व मनोहर तरुण, अधिपति व नायब अधिपति,
वीर व मंत्री व शिलेदार आहेत; त्यांस तुजवर
आणीन; २४ ते शस्त्रें, रथ, चाकांचीं वाहनें, निर-
निराळ्या लोकांचा दळभार घेऊन तुजवर येतील;
ते कवचें, ढाली व शिरस्त्राणें धारण करून तुला
चोहोंकडून घेरितील; मी न्याय करण्याचें काम त्यांस
सोपून देईन, म्हणजे ते आपल्या कायद्यांस अनु-
सरून न्याय करितील. २५ मी तुजवर माझी ईर्ष्या
रोखीन म्हणजे ते संतापून तुझा समाचार घेतील; ते
तुझें नाक व कान कापून टाकितील; तुझीं अवशिष्ट
माणसें तरवारीनें पडतील; ते तुझ्या कन्या व पुत्र हरण
करितील, तुझीं अवशिष्ट माणसें अग्नीनें भस्म होतील.
२६ ते तुझीं वस्त्रें हरण करितील, तुझें उत्कृष्ट जवाहीर
हिसकावून घेतील. २७ अशी तुझी शिंदळकीची खोड,
मिसर देशांत तुला लागलेली व्यभिचाराची चट, मी
मोडीन, म्हणजे तूं त्यांजकडे पुनः ढुंकून पाहणार
नाहींस व मिसर देशाचें स्मरण तूं यापुढें करणार नाहींस.
२८ प्रभु परमेश्वर म्हणतो, पाहा, ज्यांचा तूं द्वेष करि-
तोस त्यांच्या स्वाधीन तुला मी करीन, ज्यांवरून तुझें
मन उडालें आहे त्यांच्या हातीं तुला देईन; २९ ते

द्वेषानें तुझा समाचार घेतील,. ते तुझी सर्व मालमत्ता
हरून तुला नागवी उघडी करितील; अशानें तुझ्या शिंदळ-
चाळ्यांची, तुझ्या कामासक्तीची व तुझ्या व्यभिचाराची
लाज उघडी पडेल. ३० तूं व्यभिचार करावयासाठीं
अन्य राष्ट्रांच्या मागें लागलीस, व त्यांच्या मूर्तींनीं आप-
णास विटाळिलें म्हणून हें सर्व तुला प्राप्त होईल.
३१ तूं आपल्या बहिणीच्या मार्गानें गेलीस म्हणून मी
तिच्याप्रमाणें तुझ्याहि हातीं पेला देईन. ३२ प्रभु पर-
मेश्वर म्हणतो, तूं आपल्या बहिणीच्यासारखा खोल व
मोठा पेला पिशील; त्याचें माप मोठें असल्यामुळें तूं
हास्य व थट्टा यांस पात्र होशील. ३३ तूं निशा व शोक
यांनीं व्याप्त होशील, तुझी बहीण शोमरोन हिचा पेला
विस्मय व विध्वंस यांचा आहे. ३४ तूं तो निथळून
पिशील, त्याच्या खापऱ्या तूं कुरतडून खाशील व त्यांनीं
तूं आपलें ऊर ओरबाडशील; कारण मी हें बोललों
आहें, असें प्रभु परमेश्वर म्हणतो. ३५ यास्तव प्रभु
परमेश्वर म्हणतो, तूं मला विसरली आहेस, व तूं
माझ्याकडे पाठ फिरविली आहे, म्हणून तूं आपल्या
कामासक्तीचें व व्यभिचाराचें फळ भोग.

३६ आणखी परमेश्वर मला म्हणाला, मानवपुत्रा,
तूं अहला व अहलीबा यांचा न्याय करतोस ना?
तर त्यांस त्यांचीं अमंगळ कृत्यें दाखीव. ३७ कारण
त्यांनीं व्यभिचार केला आहे, त्यांच्या हातांला रक्त लागलें
आहे, त्यांनीं आपल्या मूर्तींबरोबर व्यभिचार केला आहे,
आणि मजपासून त्यांस झालेले पुत्र मूर्तींस भक्ष्य व्हावे
म्हणून त्यांनीं अग्नींत त्यांचे होम केले आहेत. ३८ त्यांनीं
आणखी मजबरोबर हेंहि वर्तन केलें आहे कीं त्यांनीं
त्याच दिवशीं माझें पवित्रस्थान अपवित्र केलें आणि
माझे शब्बाथ भ्रष्ट केले. ३९ कारण त्यांनीं आपल्या
पुत्रांचा वध करून ते आपल्या मूर्तींस अर्पण केले, तेव्हां
त्याच दिवशीं त्या माझें पवित्रस्थान अपवित्र करण्यासाठीं
त्यांत आल्या; पाहा, माझ्या मंदिरांत त्यांनीं असें वर्तन
केलें. ४० तसेंच तुम्हीं दूरदूरच्या पुरुषांस बोलावणें
पाठविलें; त्यांजकडे जासूद पाठविला आणि पाहा, ते
आले; त्यांच्यासाठीं तूं स्नान केलें, डोळ्यांत काजळ
घातलें व दागिन्यांनीं आपणास सजविलें; ४१ तूं उत्कृष्ट
मंचकावर बसलीस, त्यापुढें मेज मांडून त्यावर माझा
धूप व तेल हीं ठेवलीं. ४२ तेथें चैनी लोकांची धामधूम
चालू झाली; सामान्य पुरुषांबरोबर रानांतून आणखी
दारूबाज लोक आणविण्यांत आले; त्यांनीं त्यांच्या
हातांत बांगड्या घातल्या व डोक्यास उत्तम शिरोभूषण
घातलें. ४३ तेव्हां जी शिंदळकी करून निःसत्व झाली
होती तिजविषयीं मी म्हणालों कीं आतां ते तिच्याबरोबर
व ती त्यांच्याबरोबर व्यभिचार करील काय? ४४ लोक
वेश्येकडे जातात तसे ते तिजकडे गेले; ते अहला व
अहलीबा या शिंदळ स्त्रियांकडे गेले. ४५ तथापि
धार्मिक लोक जारिणींचा व खुनी स्त्रियांचा न्याय करि-
तात तसा त्यांचा करितील; कारण त्या जारिणी आहेत
व त्यांच्या हातांला रक्त लागलें आहे. ४६ प्रभु परमे-
श्वर म्हणतो, मी त्यांजवर लोकांचा जमाव आणून
त्यांना दहशत पडेल व त्यांस लुटतील असें करीन.
४७ लोकांचा जमाव त्यांस दगडमार करील व आपल्या
तरवारीनें त्यांचा उच्छेद करील, ते त्यांच्या मुलां-
बाळांची कत्तल करितील व त्यांचीं घरें अग्नीनें जाळून
टाकितील. ४८ अशा प्रकारें मी देशांतून शिंदळकी
नाहींशी करीन, म्हणजे सर्व स्त्रिया सावध होऊन
तुमच्याप्रमाणें शिंदळकी करणार नाहींत. ४९ ते तुमच्या
शिंदळकीचें प्रतिफळ तुम्हांस देतील; तुम्ही आपल्या
मूर्तिपूजेच्या पातकांचें फळ भोगाल; तेव्हां तुम्हांस
समजेल कीं मी प्रभु परमेश्वर आहें.

२४ १ नंतर नवव्या वर्षी, दहाव्या महिन्याच्या
दशमीस परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
२ मानवपुत्रा, तूं ही तारीख, आजची तारीख
लिहून ठेव; आज तारखेस बाबेलचा राजा यरुशलेमावर
आऊन पडला आहे. ३ या फितुरी घराण्यास दाखला
देऊन असें म्हण, प्रभु परमेश्वर म्हणतो एक कढई चुली-
वर ठेव, ती ठेवल्यावर तींत पाणी ओत; ४ मांड्या
व खांदे असे मांसाचे चांगले चांगले तुकडे जमा करून
तींत टाक; तींत निवडक हाडें भर. ५ कळपांतून एक
चांगलें मेंढरूं निवडून घे; हाडें शिजविण्यासाठीं खालीं

लाकडांचीरास कर; तें चांगलें शिजूं दे; त्यांतील हाडेंहि
चांगलीं शिजूं दे.
६ यास्तव प्रभु परमेश्वर म्हणतो, ह्या खुनी नगरीला
धिक्कार असो ! ती गंज चढलेल्या कढईसारखी आहे,
तिचा गंज निघत नाहीं; तींतला एकएक तुकडा बाहेर
काढ, त्यावर चिठ्या टाकावयाच्या नाहींत. ७ कारण
तिनें रक्तपात केला आहे, त्या रक्तानें ती भरली आहे,
तें तिनें उघड्या खडकावर पडूं दिलें आहे; धुळीनें तें
झाकूं नये म्हणून तिनें तें जमिनीवर पडूं दिलें नाहीं.
८ संताप उत्पन्न होऊन सूड उगवावा ह्यासाठीं तिनें
रक्त पाडिलें आहे, तें झाकतां येऊं नये म्हणून तें
उघड्या खडकावर पडावें असें मीं केलें आहे. ९ यास्तव
प्रभु परमेश्वर म्हणतो, ह्या खुनी नगरीला धिक्कार असो !
मी सरपणाचा ढीगहि मोठा करीन. १० लाकडें भरपूर
घाल, आग चांगली पेटीव, मांस चांगलें शिजीव, रसा
चांगला घट्ट होऊं दे, हाडेंहि भाजून काढ. ११ मग
त्या विस्तवावर कढई रिकामीच ठेव म्हणजे तिची
पितळ तप्त व धगधगीत होऊन तिचा मळ आंतल्या-
आंत जळेल, तिचा गंज निघून जाईल. १२ ती श्रम
करून करून भागली तरी तिजवर दाट बसलेला गंज
निघून गेला नाहीं; गंजासहित तिला आगींत टाका.
१३ तुझी अशुद्धता पाहावी तर ती भयंकर आहे; मीं
तुला स्वच्छ करूं पाहिलें तरी तूं स्वच्छ झाली नाहींस;
तुजवरील माझ्या संतापाची तृप्ति झाल्यावांचून तूं
शुद्ध व्हावयाची नाहींस. १४ मी परमेश्वर हें बोललों
आहें; हें घडेलच, हें मी करीनच; मी मागें हटणार
नाहीं, गय करणार नाहीं, याचा मला अनुताप होणार
नाहीं; तुझ्या आचारांनुसार, तुझ्या कर्मांनुसार, ते तुझा
न्याय करितील, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.
१५ पुनः परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
१६ मानवपुत्रा, पाहा, मी तुझ्या नेत्रांस जें प्रिय तें
सपाट्यासरशीं तुजपासून काढून घेतों; तरी तूं शोक
करणार नाहींस, रडणार नाहींस, अश्रु गाळणार नाहींस.
१७ उसासा मुकाट्यानें टाक; मृतांसाठीं शोक करूं
नको, डोक्याला शिरोभूषण घाल, पायांत जोडा घाल,
आपले ओंठ झाकूं नको, सुतकांत लोक अन्न पाठवि-
तात तें खाऊं नको. १८ सकाळीं मी लोकांस हें
म्हणालों, आणि संध्याकाळीं माझी बायको मेली;
तेव्हां मला आज्ञा झाली होती तसें मीं दुसऱ्या दिवशीं
सकाळीं केलें. १९ यावरून लोक मला म्हणाले, तूं हें
करितोस त्याचा आम्हांशीं काय संबंध आहे तें
आम्हांस सांगशील काय ? २० मी त्यांस म्हणालों,
परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें आहे कीं २१ इस्रा-
एली घराण्यास असें सांग, प्रभु परमेश्वर म्हणतो, पाहा,
तुमच्या बळाचा आधार, तुमच्या नेत्रांना प्रिय, तुमच्या
जिवाचा जिव्हाळा, असें जें माझें पवित्रस्थान तें मी
भ्रष्ट करीन आणि तुम्हीं मागें ठेविलेले तुमचे कन्यापुत्र
तरवारीनें पडतील. २२ मग मीं केलें आहे तसें तुम्ही
कराल, तुम्ही ओठ झांकणार नाहीं व सुतकांत लोक अन्न
पाठवितात तें तुम्ही खाणार नाहीं. २३ तुम्ही आपल्या
डोक्यास शिरोभूषण घालाल, पायांत जोडा घालाल,
तुम्ही शोक करणार नाहीं, रडणार नाहीं, तर आपल्या
अधर्मानें झुराल व एकमेकांस पाहून उसासे टाकाल.
२४ या प्रकारें यहेज्केल तुम्हांस चिन्हवत् होईल;
त्यानें केलें त्याप्रमाणें तुम्ही कराल; हें घडून येईल
तेव्हां तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.
२५ हे मानवपुत्रा, त्यांचें बळ, त्यांचा वैभवमूलक
हर्ष, त्यांच्या नेत्रांना प्रिय वाटणाऱ्या वस्तु, त्यांच्या
जिवाचा इष्टविषय आणि त्यांचे कन्यापुत्र मी त्यांजपासून
हरण करीन; २६ त्या दिवशीं निभावलेला एकादा
माणूस तुझ्या कानावर हें वर्तमान घालण्यास तुजकडे
येईल. २७ त्या दिवशीं त्या निभावलेल्या माणसाबरोबर
बोलण्यास तुझें तोंड उघडेल; तूं बोलशील, यापुढें
तूं स्तब्ध राहणार नाहींस; असा तूं त्यांस चिन्हवत्
होशील, म्हणजे त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.

## २५

१ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
२ मानवपुत्रा, अम्मोन वंशजांकडे आपलें मुख
करून त्यांजविषयीं संदेश दे; ३ अम्मोन वंशजांस
म्हण, प्रभु परमेश्वराचें वचन ऐका; प्रभु परमेश्वर असें

म्हणतो, माझें पवित्रस्थान अपवित्र करण्यांत आलें,
इस्राएल देश ओसाड करण्यांत आला, यहूदाचें घराणें
बंदिवान करून नेण्यांत आलें तेव्हां तूं, वाहवा
असें म्हटलें; ४ म्हणून पाहा, मी पूर्वेकडील लोकांस
तुझा ताबा देईन, ते तुझ्यांत छावणी करून राहतील
व आपलीं घरें बांधितील; ते तुझ्यांतलीं फळें खातील
व तुझें दूध पितील. ५ मी राब्बा नगरास उंटांचा
गोठा करीन, अम्मोन वंशजांचा मेंढ्याबकऱ्या बसावयाचा
वाडा करीन; तेव्हां तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर
आहें. ६ कारण प्रभु परमेश्वर म्हणतो, तूं इस्राएल
देशाविषयीं टाळ्या पिटल्यास, थैथै नाचलास व त्याची
दुर्दशा पाहून तूं मनापासून द्वेषपूर्वक आनंद केलास;
७ म्हणून पाहा, मी आपला हात तुजवर उगारीन, मी
तुला राष्ट्रांच्या हातीं लूट म्हणून देईन, तुला राष्ट्रांतून
उच्छेद करीन, देशांमधून तुला नाहींसें करीन, तुला मी
नष्ट करीन; तेव्हां तुला समजेल कीं मी परमेश्वर आहें.
८ प्रभु परमेश्वर असें म्हणतो, मवाब व सेईर
म्हणतात कीं पाहा, यहूदाचें घराणें इतर राष्ट्रांसारखेंच
आहे; ९ म्हणून पाहा, मी मवाबाचा स्कंधप्रदेश
उघडा करीन, त्याचीं नगरें, त्याच्या सीमांतलीं नगरें,
देशाला भूषण अशीं बेथ-यशिमोथ, बाल-मौन,
किर्याथाईम हीं नगरें, १० व अम्मोन वंशजांचा देश,
हीं पूर्वेकडील लोकांस स्वारी करण्यास खुलीं करून
देईन; त्यांचा मी त्यांस ताबा देईन, म्हणजे मग
अम्मोन वंशजांचें नांव राष्ट्रांमध्यें यापुढें कोणी
काढणार नाहीं. ११ मवाबावर मी न्यायदंड आणीन;
तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.
१२ प्रभु परमेश्वर म्हणतो, अदोमानें यहूदाच्या
घराण्याचा सूड उगविण्याच्या बुद्धीनें वर्तन केलें,
त्यानें त्याजवर सूड उगविला हें पातक केलें;
१३ म्हणून प्रभु परमेश्वर म्हणतो, मी अदोमावर
आपला हात उगारीन, त्यांतून मनुष्य व पशु यांचा
संहार करीन. तो तेमानापासून पुढें वैराण करीन,
ददानापर्यंत लोक तरवारीनें पडतील. १४ मी आपले
लोक इस्राएल यांच्या हातून अदोमाचा सूड घेईन;
माझ्या आवेशयुक्त क्रोधानुसार ते अदोमाची वाट
लावितील; त्यांस माझ्या सुडाचा अनुभव येईल, असें
प्रभु परमेश्वर म्हणतो.
१५ प्रभु परमेश्वर म्हणतो, पलिष्टयांनीं सूड घेण्याची
कृति केली आहे, मनांत आकस धरून नाश करण्याच्या
बुद्धीनें त्यांनीं निरंतरच्या वैरभावानें सूड घेतला
आहे; १६ म्हणून प्रभु परमेश्वर म्हणतो, मी आपला
हात पलिष्टयांवर उगारीन, करेथ्यांचा संहार करीन
आणि समुद्रकिनाऱ्यावरील अवशिष्ट राहिलेल्यांचा
नाश करीन. १७ त्यांस संतापानें शिक्षा करून मी
त्यांचा भयंकर सूड घेईन; मी त्यांजवर सूड उगवीन
तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.

२६ १ नंतर अकराव्या वर्षी महिन्याच्या प्रति-
पदेस, परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें
तें हें: २ मानवपुत्रा, सोर यरुशलेमेविषयीं
म्हणत आहे, अहा ! जी केवळ राष्ट्रांचें प्रवेशद्वार
अशी होती ती मोडून गेली आहे आणि आतां लोकप्रवाह
मजकडे वळला आहे; ती उजाड झाली आहे, म्हणून
आतां माझी भरभराट होणार आहे; ३ यास्तव प्रभु
परमेश्वर म्हणतो, पाहा, अगे सोरे, मी तुजविरुद्ध
आहें, समुद्र आपल्या लाटा लोटितो त्याप्रमाणें मी
तुजवर बहुत राष्ट्रें लोटीन. ४ ते सोरेच्या तटांचा
विध्वंस करितील व तिचे बुरूज पाडून टाकितील; मी
तिजवरील माती खरडून काढून तिचा उघडा खडक
करीन. ५ ती समुद्रांत जाळीं पसरण्याचें ठिकाण
होईल; मीं हें म्हटलें आहे असें परमेश्वर म्हणतो; लूट
म्हणून ती राष्ट्रांच्या हातीं लागेल. ६ तिच्या भूप्रदेशांत
असलेल्या तिच्या कन्या तरवारीनें ठार होतील; तेव्हां
त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें. ७ कारण प्रभु
परमेश्वर म्हणतो, पाहा, मी बाबेलचा राजा, राजाधिराज
नबुखद्नेस्सर, यास उत्तरेकडून घोडे, रथ, स्वार व मोठें
दळ यांसह सोरेवर आणीन. ८ भूप्रदेशांतल्या तुझ्या
कन्यांस तो तरवारीनें वधील; तो तुजविरुद्ध बुरूज
बांधील, मोर्चा रचील व तुजविरुद्ध ढालींचा कोट
उभारील. ९ तो तुझ्या तटांस आपलीं आघातयंत्रें

करील, आपल्या हत्यारांनीं तुझे बुरूज पाडून टाकील.
१० त्याचे घोडे इतके येतील कीं त्यांनीं उडविलेल्या
धुळीनें तूं झाकून जाशील; तटबंदीचीं नगरें फोडून आंत
शिरतात तसे तो तुझ्या वेशींतून आंत शिरेल, तेव्हां
स्वार, चाकें व रथ यांच्या आवाजानें तुझे तट हादर-
तील. ११ तो आपल्या घोड्यांच्या टापांनीं तुझे सर्व
रस्ते तुडवील; तो तुझे लोक तरवारीनें ठार मारील,
तुझे मजबूत स्तंभ जमीनदोस्त होतील. १२ ते तुझी
संपत्ति लुटितील, तुझा माल लुटितील; तुझे तट उद्ध्वस्त
करितील, तुझे रंगमहाल पाडून टाकितील; तुझे पाषाण,
लाकूड, माती वगैरे सर्व कांहीं पाण्यांत बुडवून
टाकितील. १३ मी तुझ्या गीतांचा ध्वनि बंद पाडीन,
तुझ्या वीणांचा सूर पुनः ऐकूं येणार नाहीं. १४ मी
तुझा उघडा खडक करून तुला जाळें पसरण्याचें
ठिकाण करीन; तुला पुनः बांधणार नाहींत; मीं पर-
मेश्वरानें हें म्हटलें आहे, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

१५ प्रभु परमेश्वर सोरेस म्हणतो, तुझ्या पतनाच्या
आवाजानें, जखमी झालेल्यांच्या कण्हण्यानें, तुझ्यामध्यें
चाललेल्या कत्तलीनें द्वीपांचा थरकांप होणार नाहीं का?
१६ तेव्हां सर्व दर्यावर्दी सरदार आपआपल्या आसनां-
वरून उतरून खालीं येतील, आपले झगे काढून ठेवि-
तील, आपलीं जरतारी वस्त्रें काढून टाकतील; ते
भीतिरूप वस्त्रें धारण करून जमिनीवर बसतील,
क्षणोक्षणीं त्यांचा थरकांप होईल व तुजविषयीं ते विस्मय
पावतील. १७ ते तुजविषयीं शोक करून म्हणतील,
अगे कीर्तिमान् नगरी, तूं जशी काय समुद्रांतून उद्भवून
वसली होतीस, तूं समुद्रावर पराक्रमी होतीस, तूं व
तुझे रहिवासी यांचा तेथील सर्व लोकांस वचक असे,
ती तूं कशी नष्ट झालीस! १८ तुझ्या पतनदिनीं द्वीपांचा
थरकांप होत आहे; तुझ्या निर्याणानें समुद्रांतील द्वीपें
भयचकित झालीं आहेत. १९ प्रभु परमेश्वर म्हणतो,
मी तुला निर्जन झालेल्या नगरांप्रमाणें ओसाड नगरी
करीन व तुजवर खोल सागराचा लोट आणून
प्रचंड जलप्रवाहांनीं तुला व्यापून टाकीन, २० तेव्हां
गर्तेंत गेलेल्या प्राचीन कालच्या लोकांकडे तुला खालीं
टाकून गर्तेंत गेलेल्यांबरोबर प्राचीन कालापासून ओसाड
असलेल्या स्थानांत पृथ्वीच्या अधोभागीं तुला राहा-
वयास लावीन म्हणजे तूं पुनः वसणार नाहींस; पण मी
जीवंतांच्या भूमीला वैभव देईन; २१ लोकांस दहशत
पडेल असा तुझा मी विध्वंस करीन, तूं नाहींशी
होशील; तुझा शोध करितील तरी तूं कधींहि सांपडा-
वयाची नाहींस, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

२७ १ परमेश्वराचें वचन पुनः मला प्राप्त झालें
कीं २ मानवपुत्रा, सोरेसंबंधानें विलाप कर;
३ तिला सांग, प्रभु परमेश्वर म्हणतो, अगे
सोरे, समुद्राच्या प्रवेशस्थानाजवळ वसलेल्ये, अनेक
द्वीपांशीं राष्ट्रांचा व्यापार चालविणाऱ्ये; तूं म्हणतेस, मी
सौंदर्याची खाण आहें. ४ तुझ्या सीमा समुद्रानें वेष्टि-
लेल्या आहेत; बांधणाऱ्यांनीं तुला सौंदर्यपूर्ण बनविलें
आहे. ५ त्यांनीं सनीरच्या सरूंनीं तुझी तक्तपोशी
केली; तुझ्यासाठीं डोलकाठी करावी म्हणून त्यांनीं
लबानोनाचे गंधसरू आणिले. ६ त्यांनीं तुझीं वल्हीं
बाशानांतील अल्लोनाच्या झाडांचीं केलीं; तुझ्या बैठकी
कित्ती द्वीपांतल्या बाक्स लाकडाच्या केल्या असून
हस्तिदंतानें जडलेल्या होत्या. ७ तुझें शीड मिसर
देशाहून आणिलेल्या वेलबुट्टीदार उत्तम तागाचें होतें,
तुला तें निशाणादाखल होतें; तुझें छत एलीशा बेटांतील
निळ्या व जांभळ्या रंगांच्या कापडाचें होतें. ८ सीदोन
व अर्वद येथले रहिवासी तुझे वल्हेकरी असत. हे
सोरे, तुझ्यांत चतुर पुरुष होते, ते तुझे तांडेल असत.
९ गबालचे वडील व कुशल कारागीर तुझ्या जहाजांची
फुटतूट दुरुस्त करीत असत; समुद्रांतील सर्व
तारवें व त्यांचे नावाडी तुझ्या मालाची देवघेव
करण्यासाठीं तुझ्यांत असत. १० तुझ्या सैन्यांत पारसी,
लूदी व पूटी हे तुझे लढवय्ये असत; ते तुझ्यांत
आपल्या ढाली व शिरस्त्राणें टांगीत; ते तुला तेजस्वी
करीत. ११ अर्वदचे लोक तुझ्या सैन्यासह तुझ्या
तटांवर सभोवार असत; तुझ्या बुरुजांवर शूर पुरुष
असत; ते तुझ्या तटांवर चोहोंकडे आपल्या ढाली
टांगून तुला सौंदर्ययुक्त करीत. १२ सर्व प्रकारचा माल

तुजजवळ विपुल असे म्हणून तार्शीश तुजबरोबर व्यापार
करी; तुझ्या मालाच्या मोबदला ते तुला रुपें, लोखंड,
कथील व शिसें देत. १३ यावान, तुबाल व मेशेख हे तुज-
बरोबर व्यापार करीत; तुझ्या मालाच्या मोबदला म्हणून
ते तुला माणसें व पितळेचीं भांडीं देत. १४ तोगार्माचे
वंशज तुझ्या मालाबद्दल तुला घोडे, स्वारीचे घोडे व
खेचरें देत. १५ ददानी लोक तुजबरोबर व्यापार करीत;
अनेक द्वीपें तुझ्या व्यापाराच्या सोईचीं असत; ते
तुझ्या मालाबद्दल तुला हस्तिदंती शिंगें व अबनूस देत.
१६ तुझे कारागिरीचे पदार्थ बहुविध असल्यामुळें
अरामी लोक तुजबरोबर व्यापार करीत; ते तुझ्या
मालाबद्दल तुला पाच, जांभळा रंग, तारकशी वेलबुट्टीदार
उत्तम वस्त्रें, प्रवाळ व माणकें देत. १७ यहूदा व
इस्राएल देशांतले लोक तुजबरोबर व्यापार करीत; ते
तुझ्या मालाबद्दल तुला मिन्नीथाचा गहूं, मेवामिठाई,
मध, तेल व ऊद देत. १८ तुझ्या कारागिरीचा माल
विपुल असल्यामुळें व सर्व तऱ्हांचा माल तुजजवळ
मुबलक असल्यामुळें दिमिष्क तुजबरोबर व्यापार करी व
तुझ्या मालाबद्दल तो तुला हेल्बोनाचा द्राक्षारस व
पांढरी लोकर देई. १९ वदान व यावान हे तुझा माल
घेऊन तुला सूत देत; पोलाद, तज व अगरु हीं तुझ्या
व्यापाराच्या मालापैकीं असत. २० ददान तुजबरोबर
व्यापार करून तुला स्वारीचा साज पुरवी. २१ अरब-
स्तान व केदारचे सर्व सरदार व्यापारासंबंधानें तुझ्या
मुठींतले असत; कोकरें, एडके व बोकड यांचा ते
तुजबरोबर सौदा करीत. २२ शबा व रामा येथील
व्यापारी तुजबरोबर व्यापार करीत; ते तुझा माल घेऊन
तुला हरतऱ्हेचे उंची मसाले, जवाहीर व सोनें देत.
२३ हारान, कन्ने, एदेन, शबा, अश्शूर व किल्मद
येथले व्यापारी तुजबरोबर व्यापार करीत. २४ ते तुझा
माल घेऊन उत्तम वस्त्रें, जांभळे व वेलबुट्टीदार झगे,
उंची वस्त्रांच्या पेट्या व वळलेल्या टिकाऊ दोऱ्या वगैरे
व्यापाराच्या वस्तु तुला देत. २५ तार्शीशचीं गलबतें
तुझ्या मालाची नेआण करणारे जणूं काय काफलेच
होते; भर समुद्रांत तूं फार समृद्ध व वैभवशाली
झालीस. २६ तुझ्या वल्हेकऱ्यांनीं तुला खोल पाण्यांत
नेलें; पूर्वेच्या वाऱ्यानें तुला भर समुद्रांत मोडून
टाकिलें. २७ तुझें धन, तुझा माल, तुझे व्यापाराचे
जिन्नस, तुझे नावाडी, तुझे खलाशी, तुझी फूटतूट
दुरुस्त करणारे, तुझ्या मालाची देवघेव करणारे,
तुझ्यांतले सर्व लढवय्ये, तुझ्यांत असलेले सगळे लोक
तुझ्या निःपातसमयीं भर समुद्रांत पडले. २८ तुझ्या
खलाशांनीं मारिलेल्या आरोळीच्या आवाजानें तुझ्या
आसपासची जमीन हादरत आहे. २९ सर्व वल्हेकरी,
खलाशी व समुद्रावर सफर करणारे सर्व नावाडी
आपआपल्या नावा सोडून किनाऱ्यावर उभे राहत आहेत;
३० ते तुझ्या स्थितीमुळें लांब हेल काढून मोठ्या दुःखानें
रडत आहेत; ते आपल्या डोक्यांत धूळ घालीत आहेत
आणि धुळींत लोळत आहेत; ३१ ते तुझ्यामुळें
डोकीं भादरून टाकून, कमरेस गोणताट गुंडाळीत
आहेत व मनांत अति खिन्न होऊन तुजसाठीं मोठ्यानें
विलाप करीत आहेत. ३२ ते शोकाकुल होऊन तुज-
विषयीं विलाप करून म्हणतात, सोरेप्रमाणें, समुद्रांत
गडप झालेल्या सोरेप्रमाणें, कोणाची तरी दशा झाली
आहे काय? ३३ जलमार्गानें तुझा माल जाईयेई तेव्हां
तूं बहुत राष्ट्रांची चंगळ करीस; तूं आपल्या विपुल
मालानें व मोठ्या सौदाने जगांतील राजांस सधन
करीस. ३४ समुद्रलहरींनीं तूं खोल पाण्यांत फुटलीस
तेव्हां तुझा माल व तुझी सर्व मंडळी तुजबरोबर
बुडाली. ३५ द्वीपांतले सर्व लोक तुला पाहून विस्मित
झाले आहेत; त्यांचे राजे थरथर कांपत आहेत; त्यांचीं
तोंडें काळवंडलीं आहेत. ३६ राष्ट्रांतले व्यापारी तुझा
धिःकार करितात; तुझी दशा पाहून लोकांस दहशत
पडली आहे; तूं कायमची नष्ट झाली आहेस.

२८ १ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
२ मानवपुत्रा, सोरेच्या अधिपतीस सांग, प्रभु
परमेश्वर म्हणतो, तुझें हृदय उन्मत्त होऊन तूं
म्हणतोस, मी देव आहें, भर समुद्रांत मी देवाच्या
आसनावर बसलों आहें; पण तूं देव नव्हेस, मानव
आहेस; आपलें चित्त देवाच्यासारखें आहे असा तूं

आव घालितोस; ३ पाहा, दानीएलापेक्षां तूं बुद्धिमान्
आहेस; कोणतीहि गुप्त गोष्ट लोकांना तुजपासून छप-
वितां येत नाहीं; ४ तूं आपल्या अकलेनें व चातुर्यानें
धन संपादन केलें व आपल्या भांडारांत सोन्यारुप्याचा
संचय केला; ५ तूं आपल्या अकलेच्या जोरावर
व्यापार करून आपलें धन वाढविलें; या तुझ्या धनानें
तुझें हृदय उन्मत्त झालें आहे. ६ यास्तव प्रभु परमेश्वर
म्हणतो, आपलें चित्त देवाच्या चित्तासारखें आहे असा
तूं आव घालितोस; ७ म्हणून पाहा, मी तुजवर परकीय
लोक आणितों; तुजवर अन्य राष्ट्रांतले उग्र पुरुष
आणितों; तुझ्या अकलेच्या सौंदर्यावर ते तरवार उप-
सतील व तुझें तेज भ्रष्ट करितील. ८ ते तुला
गर्तेंत उतरितील; भर समुद्रांत वध पावणाऱ्यांच्या
मृत्यूसारखा तुझा मृत्यु होईल. ९ तूं आपल्या वधणाऱ्या-
समोर, मी देव आहें असें म्हणशील काय ? घायाळ
करणाऱ्याच्या हातीं सांपडलास तो तूं देव नव्हेस,
मानव आहेस. १० बेसुंती मरतात त्याप्रमाणें तूं पर-
देशीयांच्या हस्तें मरशील; हें माझें म्हणणें आहे असें
प्रभु परमेश्वर म्हणतो.

११ पुनः परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
१२ मानवपुत्रा, सोरेच्या राजाविषयीं विलाप करून
त्याला सांग, प्रभु परमेश्वर म्हणतो, तूं पूर्णतेची मुद्राच
आहेस; तूं ज्ञानपूर्ण व सर्वांगसुंदर आहेस. १३ देवाचा
बाग एदेन यांत तूं होतास; अलाक, पुष्कराज, हिरा,
लसणा, गोमेद, यास्फे, नीलमणि, पाच, माणिक, व
सोनें असें अनेक तऱ्हेचें जवाहीर तुझ्या अंगभर होतें;
खंजिऱ्या व बासऱ्या यांचें कसब तुझ्या येथें चालत
असे; तुला निर्मिलें त्या दिवशीं त्यांची योजना झाली.
१४ तूं पाखर घालणारा अभिषिक्त करूब होतास; मीं
तुझी तशी योजना केली होती; तूं देवाच्या पवित्र पर्वतावर
होतास; तूं अग्नीप्रमाणें झगझगणाऱ्या पाषाणांतून
हिंडत असस. १५ तुला निर्माण केल्या दिवसापासून
अधर्म तुझ्या ठायीं दिसून आला तोंपर्यंत तुझी चाल-
चलणूक यथायोग्य होती. १६ तुझा व्यापार मोठा
असल्यामुळें तुझ्या हृदयांत अपकारबुद्धि शिरून तूं
पातक केलें; म्हणून मीं तुला भ्रष्ट समजून परमेश्वराच्या
पर्वतावरून लोटून दिलें. हे पाखर घालणाऱ्या करूबा!
त्या अग्नीप्रमाणें झगझगणाऱ्या पाषाणांमधून काढून मीं
तुझा नाश केला आहे. १७ तुझ्या सौंदर्याच्या अभि-
मानानें तुझें हृदय उन्मत्त झालें, तुझ्या वैभवानें तुझी
बुद्धि भ्रष्ट झाली; मीं तुला भूमीवर आदळिलें, राजांनीं
तुझा तमाशा पाहावा म्हणून त्यांजपुढें तुला टाकिलें.
१८ खोटा व्यापार चालवून तूं बहुत पातकें
केलीं, त्यांनीं तूं आपलीं पवित्र स्थानें विटाळिलीं
म्हणून तुझ्यांतून अग्नि निघून तुला खाऊन टाकील,
असें मीं केलें आहे; आणि तुला पाहणाऱ्यांच्या
डोळ्यांदेखत मीं पृथ्वीवर तुझी राखरांगोळी केली
आहे. १९ राष्ट्रांमध्यें तुझ्या ओळखीचे सर्व तुला
पाहून विस्मय पावले आहेत, तुझी दशा पाहून
लोकांना दहशत पडली आहे, तूं कायमचा नष्ट
झाला आहेस.

२० मग परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
२१ मानवपुत्रा, सीदोनेकडे आपलें मुख फिरवून
तिजविरुद्ध संदेश दे; २२ तिला सांग, प्रभु परमेश्वर
म्हणतो, पाहा, हे सीदोने, मी तुजविरुद्ध आहें, व
तुझ्यामध्यें मी आपला प्रताप गाजवीन; मी तिला
न्यायदंड करीन व तिजमध्यें मी पवित्र ठरेन, तेव्हां
त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें. २३ मी तिच्यांत
मरी पाठवीन, तिच्या रस्त्यावर रक्ताचा सडा घालीन;
तिजवर चोहोंकडून तरवार चालेल आणि लोक
घायाळ होऊन तिच्या ठायीं पडतील; तेव्हां त्यांस
समजेल कीं मी परमेश्वर आहें. २४ त्यानंतर इस्राएल
घराण्याच्या आसपासच्या द्वेष्ट्यांपैकीं कोणी त्यांस बोच-
णारा कांटा व टोचणारी नांगी असें उरणार
नाहीं; तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.

२५ प्रभु परमेश्वर म्हणतो, इस्राएल घराणें ज्या
ज्या राष्ट्रांत पांगलें आहे त्यांतून मी त्यास एकवट
करीन आणि विधर्मी राष्ट्रांदेखत त्यांच्या ठायीं पवित्र
ठरेन; मग जो देश मीं आपला सेवक याकोब यास
दिला त्यांत ते वस्ती करितील. २६ ते त्यांत निर्भय

राहतील; ते घरें बांधितील, द्राक्षींचे मळे लावितील;
आणि त्यांच्या सभोवतालील त्यांच्या द्वेष्ट्यांस मी
न्यायदंड करीन तेव्हां ते निर्भयपणें वसतील; मग
त्यांस समजेल कीं मी परमेश्वर त्यांचा देव आहें.

## २९

१ दहाव्या वर्षी दहाव्या महिन्याच्या द्वादशीस
परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं २ मानव-
पुत्रा, मिसर देशचा राजा फारो याजकडे आपलें
तोंड करून त्याच्याविरुद्ध व सर्व मिसर देशाविरुद्ध संदेश
दे. ३ त्याबरोबर बोल; त्यास सांग: प्रभु परमेश्वर म्हणतो,
पाहा, हे मिसर देशच्या फारो राजा, आपल्या नद्यांत
पडून राहणाऱ्या मोठ्या मगरा, तूं जो म्हणतोस कीं नदी
माझी आहे, मीं ती स्वतांसाठीं निर्माण केली आहे,
त्या तुजविरुद्ध मी आहें. ४ मी तुझ्या जाभाडांत गळ
टोचीन, मी तुझ्या नद्यांतले मासे तुझ्या खवलांना
चिकटवीन, मी तुला तुझ्या खवलांस चिकटलेल्या
नद्यांतल्या माशांसह तुझ्या नद्यांमधून बाहेर खेचून
काढीन. ५ मी तुला व तुझ्या नद्यांतल्या सर्व माशांस
सोडून देईन; तूं उघड्या मैदानांत पडून राहशील ; तुला
कोणी उचलून आणणार नाहीं किंवा तुझी कोणी जुळवा-
जुळव करणार नाहीं, तर तूं वनपशूंस व आकाशांतील
पाखरांस खाद्य होशील असें मी करीन. ६ तेव्हां मिसर
देशचे सर्व रहिवासी समजतील कीं मी परमेश्वर आहें;
कारण इस्राएल घराण्याला मिसराचा केवळ बोरूसारखा
आधार होता. ७ त्यांनीं तुला हातांनीं धरिलें तेव्हां तूं
चिरून त्या सर्वांचे खांदे फोडून टाकिले; ते तुझ्यावर
टेकले असतां तूं मोडून गेलास व तूं सर्वांच्या कंबरा
लचकविल्या. ८ याकरितां प्रभु परमेश्वर म्हणतो, पाहा, मी
तुजवर तरवार आणीन आणि तुझ्यांतून मनुष्य व
पशु यांचा उच्छेद करीन. ९ मिसर देश ओसाड व
वैराण होईल तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर
आहें; कारण तो म्हणाला, नदी माझी आहे, मीं ती
निर्माण केली आहे. १० तर पाहा, मी तुझ्या
नद्यांवर उठेन; मी मिग्दोलपासून सवेनेपर्यंत,
कुशाच्या सीमेपर्यंत, मिसर देश ओसाड व उजाड करीन.
११ मनुष्याचा पाय त्याला लागावयाचा नाहीं, पशूच्या
पायाचा त्याला स्पर्श होणार नाहीं; चाळीस वर्षें त्यांत
कोणी वस्ती करणार नाहीं. १२ वैराण केलेल्या देशां-
मध्यें मी मिसर देश वैराण करीन, उजाड केलेल्या
नगरांमध्यें मी त्यांचीं नगरें चाळीस वर्षें उजाड करीन;
मी मिसऱ्यांस राष्ट्रांमध्यें विखरीन, त्यांस देशोधडीस
लावीन. १३ प्रभु परमेश्वर म्हणतो कीं चाळीस वर्षें
संपल्यावर मिसरी लोकांची ज्या राष्ट्रांत पांगापांग
झाली त्यांतून मी त्यांस गोळा करीन; १४ मी मिसर
देशाचा बंदिवास उलटवीन, मी पथ्रोस देशांत त्यांच्या
जन्मभूमीस त्यांस परत आणीन; तेथें त्यांचें एक
हलकेंसें राज्य होईल. १५ सर्व राज्यांमध्यें तें हलकें
होईल; तें इतःपर इतर राष्ट्रांवर वरचढ होणार नाहीं;
मी त्यांस अल्प करून ठेवीन म्हणजे ते इतर राष्ट्रांवर
सत्ता करणार नाहींत. १६ तो यापुढें इस्राएल
घराण्याला आधार व्हावयाचा नाहीं; त्यांजकडे त्यांचें
मन गेलें तर त्यांच्या पातकाचें स्मरण होईल; तेव्हां
त्यांस समजेल कीं मी प्रभु परमेश्वर आहें.

१७ पुनः सत्ताविसाव्या वर्षी, पहिल्या महिन्याच्या
प्रतिपदेस परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं १८ मानव-
पुत्रा, बाबेलचा राजा नबुखद्रेस्सर यानें सोरेस वेढा
घातला तेव्हां त्यानें आपल्या सैन्यास भारी कष्ट करा-
वयास लाविलें; सर्वांच्या डोक्यांस टकलें पडलीं, खांद्यांचीं
सालटीं निघालीं, तरी त्यानें जो खटाटोप केला त्याचा
त्याला किंवा त्याच्या सैन्याला योग्य मोबदला मिळाला
नाहीं. १९ यास्तव प्रभु परमेश्वर म्हणतो, पाहा,
बाबेलाचा राजा नबुखद्रेस्सर यास मी मिसरचा मुलूख
देईन; तेव्हां तो त्यांचा समुदाय हिरावून नेईल, त्यानें
लुटिलेलें तो लुटील; त्यानें हरण केलेलें तो हरण
करील, असा त्याच्या सैन्यास मोबदला मिळेल.
२० त्याच्या श्रमाचा मोबदला म्हणून मी त्यास
मिसरचा मुलूख देईन, कारण हे श्रम त्यांनीं मजसाठीं
केले, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

२१ त्या दिवशीं इस्राएल घराण्यास शृंग उगवे असें
मी करीन, व त्यांच्यामध्यें तुझें तोंड उघडे असें करीन;
तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.

१ पुनः परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें
३० कीं २ मानवपुत्रा, संदेश देऊन सांग, प्रभु पर-
मेश्वर म्हणतो, जळो तो दिवस, असा हाहाकार
करा. ३ कारण दिवस समीप आला आहे; परमेश्वराचा
दिवस येऊन ठेपला आहे; तो अभ्रमय दिवस आहे;
तो विधर्म्यांचा शासनदिन आहे. ४ तेव्हां मिसर
देशावर तरवार येईल, लोकांचा वध होऊन ते मिसरांत
पडतील, तेव्हां कूशांतील लोकांस वेणा येतील;
मिसरांचा समुदाय हरण केला जाईल; त्याचे पाये
मोडून टाकितील, ५ कूशी, पूटी, लूदी, सर्व मिश्र-
जाति व कूबी, आणि त्यांजबरोबर करारमदार केलेल्या
देशाचे लोक त्यांसह तरवारीनें पडतील.

६ प्रभु परमेश्वर म्हणतो, मिसर देशाला आधार
देणारे लोक पडतील, त्यांच्या पराक्रमाचा तोरा उत-
रेल, मिग्दोलापासून सवेनेपर्यंत ते तरवारीनें पडतील,
असें प्रभु परमेश्वर म्हणतो. ७ ते वैराण देशामध्यें
उध्वस्त होऊन पडतील, उजाड नगरांमध्यें त्यांचीं
नगरें उध्वस्त होऊन पडतील. ८ मी मिसरास आग
लावीन व त्याचे सर्व साहाय्यकर्ते नष्ट होतील, तेव्हां
त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें. ९ त्या दिवशीं
त्या निश्चिंत कूशी लोकांला घाबरवून सोडण्यासाठीं
मजकडील जासूद जहाजांत बसून जातील; मिसरावर
प्रसंग आला तेव्हांच्याप्रमाणें त्यांस वेदना होतील;
कारण पाहा, तो प्रसंग येत आहे.

१० प्रभु परमेश्वर म्हणतो, बाबेलाचा राजा नबुखद्ने-
स्सर याच्या हस्तें मी मिसराचा लोकसमुदाय नाहींसा
करीन. ११ तो व सर्व लोकांमध्यें भयंकर असे त्याचे
लोक ह्यांना या देशाचा नाश करावयास आणीन; ते
मिसरावर आपल्या तरवारी उपसून वधिलेल्या मनुष्यांनीं
सर्व देश भरून टाकितील. १२ मी नद्या कोरड्या
करीन, ही भूमि विकून दुष्ट मनुष्यांच्या हातीं देईन,
आणि परक्यांच्या हातून हा देश व यांतलें सर्व कांहीं
यांची नासधूस करवीन; मी परमेश्वर हें बोललों आहें.

१३ प्रभु परमेश्वर म्हणतो, मी नोफांतील दैवतांचा
उच्छेद करीन, मूर्ति नाहींतशा करीन, आणि मिसर
देशांतला कोणीहि यापुढें अधिपति होणार नाहीं असें
करीन; मिसर देश दहशतीनें भरीन. १४ मी पथ्रोस
उजाड करीन. सोअनास आग लावीन, नो याला
न्यायदंड करीन. १५ मिसराचा दुर्ग जो सीन त्यावर मी
आपल्या क्रोधाग्नीचा वर्षाव करीन व नो येथील लोक-
समुदायाचा उच्छेद करीन. १६ मी मिसरास आग
लावीन; सीन वेणा देईल, नो छिन्नभिन्न होईल, नोफा-
वर तर भरदिवसा वैरी उठतील. १७ आवेन व
पी-बेसेथ येथील तरुण पुरुष तरवारीनें पडतील; हीं
नगरें जिंकलीं जातील. १८ मिसऱ्यांनीं घातलेलें जोखड
मी मोडून टाकीन व त्यांच्या पराक्रमाचा गर्व जिरेल
तेव्हां तहपन्हेस येथें दिवस अंधारमय होईल, तें
अभ्रानें आच्छादिलें जाईल, त्याच्या कन्या बंदिवान
होऊन जातील. १९ या प्रकारें मी मिसरास न्यायदंड
करीन; तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.

२० तेव्हां अकराव्या वर्षी, पहिल्या महिन्याच्या
सप्तमीस परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं २१
मानवपुत्रा, मिसरी राजा फारो याचा भुज मीं मोडिला
आहे; पाहा, त्यास पुनः तरवार धरण्याची शक्ति यावी
म्हणून त्यास औषधोपचार करून पट्टी बांधावयाची ती
कोणीं बांधिली नाहीं. २२ यास्तव प्रभु परमेश्वर म्हणतो,
पाहा, मी मिसरी राजा फारो याच्याविरुद्ध आहें;
त्याचा शाबूत व मोडका असे दोन्ही हात मी तोडून
टाकीन, त्याच्या हातची तरवार गळेल असें मी करीन.
२३ मी मिसऱ्यांस राष्ट्रांमध्यें पांगवीन, त्यांना देशो-
धडीस लावीन, २४ मी बाबेलाच्या राजाचे भुज बळ-
कट करीन, मी आपली तरवार त्याच्या हातीं देईन;
पण मी फारोचे भुज असे मोडीन कीं एखाद्या भयंकर
घायाळ झालेल्या मनुष्याप्रमाणें तो त्याजपुढें आक्रोश
करील. २५ मी बाबेलाच्या राजाचे भुज बळकट करीन,
आणि फारोचे भुज गळतील; मी मिसर देशावर उगा-
रण्यासाठीं बाबेलाच्या राजाचे हातीं तरवार देईन
तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें. २६ मी
मिसऱ्यांस राष्ट्रांमध्यें विखरीन, त्यांस देशोधडीस लावीन;
तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.

**३१** १ अकराव्या वर्षी, तिसऱ्या महिन्याच्या प्रतिपदेस परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं २ मानवपुत्रा, मिसर देशाचा राजा फारो व त्याचा लोकसमूह यांस विचार कीं तूं मोठेपणानें कोणासमान आहेस ? ३ पाहा, अश्शूर हा लबानोनाचा एक गंधसरू असून त्याला सुंदर फांद्या फुटल्या, त्याची छाया गर्द झाली, तो उंच वाढून त्याचा शेंडा मेघमंडळास जाऊन भिडला. ४ पाण्यानें त्याला पोषिलें, जलाशयानें त्याला वाढविलें, त्यांतून निघणारे प्रवाह लागवड केलेल्या सर्व मळ्यांत खेळत असत, आणि त्याचे पाट वनांतल्या सर्व झाडांस जाऊन पोहचत असत. ५ यास्तव वनांतल्या सर्व झाडांहून त्याची उंची मोठी झाली, पाण्याच्या विपुलतेनें त्याला फांद्या फार फुटल्या व त्याच्या डहाळ्या लांबवर पसरल्या. ६ आकाशांतील सर्व पाखरें त्याच्या फांद्याफांद्यांनीं घरटीं करीत, त्याच्या खांद्यांच्या आश्रयानें सर्व वनपशु पोरें वीत, त्याच्या छायेखालीं मोठमोठीं राष्ट्रें वस्ती करून राहत. ७ असा तो मोठा होऊन त्याला लांबलांब फांद्या फुटल्या म्हणून तो फार सुंदर दिसे, कारण त्याचें मूळ मोठ्या जलाशयानजीक होतें. ८ देवाच्या बागेंतील देवदारूंच्यानें त्याला झाकून टाकितां येईना; सुरूच्या फांद्या त्याच्या तोडीच्या नव्हत्या; अर्मोनवृक्ष त्याच्या शाखांच्या तोडीचा नव्हता; देवाच्या बागेंतील कोणतेंहि झाड त्याची बरोबरी करणारें नव्हतें. ९ मीं त्याला असंख्य फांद्या फुटूं देऊन एवढें सुंदर केलें होतें कीं देवाच्या एदेन बागेंतील सर्व झाडें त्याचा हेवा करीत.

१० ह्यास्तव प्रभु परमेश्वर म्हणतो, त्यानें आपणाला उंच केलें आहे, आपल्या शेंड्यानें त्यानें मेघमंडळास भेदिलें आहे, तो उंच झाल्यामुळें त्याचें मन उन्मत्त झालें आहे; ११ म्हणून मी त्याला एका बलिष्ठ राष्ट्राच्या स्वाधीन करीन; तो खात्रीनें त्याचा समाचार घेईल; त्याच्या दुष्टतेमुळें मीं त्याचा त्याग केला आहे. १२ अन्य राष्ट्रांतल्या भयंकर परक्या लोकांनीं त्याला छेदून टाकिलें, व फेकून दिलें: त्याच्या डहाळ्या पर्वतांवर व सर्व खोऱ्यांत पडल्या आहेत; देशांतल्या सर्व नाल्यानाल्यांतून त्याच्या फांद्या मोडून पडल्या आहेत; पृथ्वीवरचीं सर्व राष्ट्रें त्याच्या छायेंतून गेलीं आहेत; त्यांनीं त्याला सोडिलें आहे. १३ त्या पडलेल्या वृक्षावर आकाशांतील पाखरें बसतात, सर्व वनपशु त्याच्या फांद्यांमध्यें येतात; १४ पाण्यानजीक लाविलेल्या कोणत्याहि वृक्षानें आपल्या उंचीमुळें गर्व करूं नये, आपल्या शेंड्यानें मेघमंडळास भेदूं नये, पाण्यानें पोसलेल्या वृक्षानें आपल्या उंचीमुळें स्वतांवर भिस्त ठेवूं नये, म्हणून हें घडून आलें आहे; कारण त्या सर्वांस मृत्यूच्या, अधोलोकाच्या स्वाधीन करण्यांत आलें आहे; ज्या गर्तेंत मानवपुत्र जातात तींत त्यांसहि जावयास लाविलें आहे.

१५ प्रभु परमेश्वर म्हणतो, ज्या दिवशीं तो अधोलोकीं गेला त्या दिवशीं मीं विलाप करविला; त्याच्यासाठीं मीं जलनिधि झाकिला, त्याचे प्रवाह बंद केले, महाजलें रोखिलीं; त्याच्यासाठीं मीं लबानोनास काळें ठिक्कर केलें. त्याच्यासाठीं वनांतले सर्व वृक्ष म्लानवदन झाले. १६ गर्तेंत जाणाऱ्यांबरोबर मीं त्यास अधोलोकीं लोटून दिलें तेव्हां त्याच्या कोसळण्याच्या आवाजानें मीं राष्ट्रांस थरथर कांपविलें; तेव्हां पृथ्वीच्या अधोभागीं असलेले एदेनाचे सर्व वृक्ष, पाण्यानें पोसलेले निवडक व अति सुंदर असे लबानोनाचे वृक्ष समाधान पावले. १७ राष्ट्रांपैकीं त्याच्या छायेला बसणारे त्याचे साहाय्यकर्ते तेहि त्यासह तरवारीनें ठार केलेल्यांमध्यें अधोलोकीं गेले.

१८ तूं वैभवानें व मोठेपणानें एदेनांतल्या वृक्षांपैकीं कोणाच्या तोडीचा आहेस ? तुला तर एदेनांतल्या वृक्षांसह अधोलोकीं लोटितील आणि तरवारीनें ठार झालेल्यांसह बेसुंत्यांमध्यें तूं पडून राहशील. फारो व त्याचा लोकसमूह यांची अशी गति होईल, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

**३२** १ बाराव्या वर्षी, बाराव्या महिन्याच्या प्रतिपदेस परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं २ मानवपुत्रा, मिसर देशाचा राजा फारो याजविषयीं विलाप कर; त्याला सांग, राष्ट्रांमध्यें तुला

तरुण सिंहाची उपमा दिली होती, तरी तूं महानदांतल्या
मगराप्रमाणे आहेस; तूं आपल्या नद्यांत उसळ्या
मारिल्या, आपल्या पायांनीं पाणी गढूळ केलें, व
त्यांच्या सर्व नद्यांची घाण केली. ३ प्रभु परमेश्वर
म्हणतो, मी बहुत राष्ट्रांच्या द्वारें तुजवर आपलें जाळें
टाकीन; ते तुला माझ्या जाळ्यानें बाहेर ओढून
काढितील. ४ मी तुला जमिनीवर सोडून देईन,
उघड्या मैदानांत तुला फेकून देईन, आकाशांतील सर्व
पाखरें तुजवर बसतील असें करीन, सर्व पृथ्वीवरील
वनपशूंची तुझ्या मांसानें तृप्ति करीन, ५ मी पर्वतांवर
तुझें मांस ठेवीन, तुझ्या धिप्पाड देहानें खोरीं भरीन.
६ तुझ्या रक्तप्रवाहानें देश बुडवून टाकीन, तो
पर्वताला जाऊन लागेल, सर्व नदीनाले तुझ्या रक्तानें
भरतील. ७ मी तुला नष्ट करीन तेव्हां मी आकाश
झाकीन व त्यांतील तारे निस्तेज करीन; मी सूर्य
मेघाच्छादित करीन, चंद्र प्रकाश देणार नाहीं. ८ मी
आकाशांतील सर्व ज्योति तुझ्यावर निस्तेज करीन,
मी तुझ्या देशावर काळोख आणीन, असें प्रभु परमे-
श्वर म्हणतो. ९ जीं राष्ट्रें, जे देश तुझ्या ओळखीचे
नाहींत, त्यांत मी तुझ्या निःपाताचें वृत्त प्रसिद्ध करीन,
तेव्हां मी बहुत राष्ट्रांचें मन उद्विग्न करीन. १० अनेक
राष्ट्रें तुला पाहून भयचकित होतील असें मी करीन;
मी आपली तरवार त्यांच्या राजांसमोर परजीन, तेव्हां
ते थरथर कांपतील; तुझ्या पतनाच्या दिवशीं आपल्या
जिवाच्या भीतीनें त्यांचा क्षणोक्षणीं थरकांप
होईल. ११ कारण प्रभु परमेश्वर म्हणतो, बाबेलाच्या
राजाची तरवार तुजवर येईल. १२ वीरांच्या तरवारींनीं
मी तुझा लोकसमूह पाडीन; ते सर्व राष्ट्रांतले
भयंकर पुरुष आहेत; ते मिसराचा गर्व हरण करितील,
त्यांच्या सर्व लोकसमूहाचा विध्वंस होईल. १३ महा-
जलांजवळील त्यांच्या सर्व गुरांढोरांचा मी उच्छेद
करीन; यापुढें कोणा मनुष्याच्या पावलानें किंवा गुराच्या
खुरानें तीं गढूळ होणार नाहींत. १४ तेव्हां मी त्यांचे
जलाशय स्वच्छ करीन, त्यांच्या नद्या तेलाप्रमाणें
वाहत्या करीन, असें प्रभु परमेश्वर म्हणतो. १५ मी
मिसर देशांतील सर्व रहिवाश्यांस मारून टाकून त्या
देशाचें अरण्य करीन व देशांतलें सर्व कांहीं नाहींसें
करून तो उजाड करीन, तेव्हां त्यांस समजेल कीं मी
परमेश्वर आहें. १६ हें विलापगीत लोक शोकपूर्वक
म्हणतील; राष्ट्रांच्या कन्या तें शोकपूर्वक म्हणतील;
मिसर देश व त्यांतील सर्व लोकसमूह यांसाठीं तें
शोकपूर्वक म्हणतील, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

१७ बाराव्या वर्षी, महिन्याच्या पौर्णिमेस परमे-
श्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं, १८ मानवपुत्रा, मिसरी
लोकसमूहासाठीं विलाप कर; त्यास, मिसरकन्येस व
प्रख्यात राष्ट्रांच्या कन्यांस गर्तेंत उतरणाऱ्यांबरोबर
अधोलोकीं लोटून दे. १९ तूं सौंदर्यानें कोणापेक्षां
वरचढ आहेस ? चल, खालीं उतर, आणि बेसुंत्यां-
बरोबर जाऊन पड, २० तरवारीनें वधिलेल्यांमध्यें
ते पडतील; तिला तरवारीच्या हवालीं केलें
आहे; तिला व तिच्या सर्व समूहास ओढून न्या.
२१ वीरांमध्यें जे प्रमुख ते त्यांजबरोबर व त्याच्या
साहाय्यकर्त्यांबरोबर अधोलोकांतून बोलतील; ते खालीं
उतरले आहेत; हे बेसुंती तरवारीनें वध पावून तेथें
पडले आहेत. २२ अश्शूर व त्याचा सर्व समुदाय तेथें
आहे; त्यांच्या कबरा त्याच्या कबरेसभोवतीं आहेत;
ते सर्व तरवारीनें वध पावून तेथें पडले आहेत;
२३ त्यांच्या कबरा गर्तेच्या अगदीं तळाशीं आहेत;
त्याच्या कबरेसभोवतीं त्याचा समुदाय आहे; जीवंतांच्या
भूमीस ज्यांनीं दहशत घातली ते सर्व वध
पावले आहेत, तरवारीनें पडले आहेत. २४ तेथें
एलाम आहे व त्याच्या कबरेसभोवतीं त्याचा सर्व
समुदाय आहे; जे जीवंतांच्या भूमीस दहशत घालीत
ते सर्व वध पावले आहेत, तरवारीनें पडले आहेत;
ते बेसुंती अधोलोकीं गेले आहेत; गर्तेंत उतरणाऱ्यां-
बरोबर ते अप्रतिष्ठा पावले आहेत. २५ त्यांनीं त्याज-
साठीं व त्याच्या सर्व समुदायासाठीं वधिलेल्यांमध्यें शय्या
तयार केली आहे; त्याच्याभोवतीं त्यांच्या कबरा आहेत;
ते सर्व बेसुंती इसम तरवारीनें ठार झालेले आहेत; त्यांनीं
जीवंतांची भूमि दहशतीनें भरली म्हणून गर्तेंत उतर-

णाऱ्यांबरोबर ते अप्रतिष्ठा पावले आहेत; वधिलेल्यांमध्यें
त्यांला ठेविलें आहे. २६ तेथें मेशेख, तुबाल व त्याचा
सर्व समूह हे आहेत; त्याच्या कबरेभोंवती त्यांच्या
कबरा आहेत; त्यांनीं जीवंतांची भूमि दहशतीनें भरिली
म्हणून ते सर्व बेसुंती इसम तरवारीनें वध पावले.
२७ बेसुंती लोकांपैकीं जे वीर समरांगणांत पडून शस्त्रास्त्रां-
सह अधोलोकीं गेले व ज्यांच्या तरवारी त्यांच्या उशाखालीं
ठेवण्यांत आल्या अशांबरोबर हे पडून राहिले नाहींत
काय? कारण जीवंतांच्या भूमींत ते वीरांस दहशत
घालीत, म्हणून त्यांचीं पातकें त्यांच्या हाडांच्या ठायीं
आहेत. २८ तूं बेसुंती लोकांमध्यें भंग पावशील व
तरवारीनें वध पावलेल्यांबरोबर तूंहि पडून राहशील.
२९ तेथें अदोम, त्याचे राजे व त्याचे सरदार हेहि
आहेत; ते सर्व शूर असूनहि त्यांस तरवारीनें ठार
केलेल्यांबरोबर ठेविलें आहे. त्यांस बेसुंती लोकांबरोबर
व गर्तेंत उतरणाऱ्यांबरोबर ठेविलें आहे. ३० उत्तरेकडील
सरदार व वधिलेल्यांबरोबर उतरून गेलेले सिदोनी हे
सर्व तेथें आहेत; त्यांच्या शौर्यामुळें त्यांचा वचक
बसला होता तरी त्यांची अप्रतिष्ठा झाली; ते बेसुंती लोक
तरवारीनें वधिलेल्यांबरोबर पडले आहेत व गर्तेंत उतर-
णाऱ्यांबरोबर अप्रतिष्ठा पावले आहेत. ३१ फारो त्यांस
पाहील तेव्हां तो आपल्या सर्व लोकसमूहासंबंधानें समा-
धान पावेल; फारो व त्याचें सर्व सैन्य यांस तरवारीनें
वधिलें आहे, असें प्रभु परमेश्वर म्हणतो. ३२ मीं फारोला
जीवंतांच्या भूमीवर दहशत घातली तरी तो व त्याचा
सर्व लोकसमूह यांस बेसुंती लोकांमध्यें तरवारीनें वधि-
लेल्यांबरोबर ठेविलें आहे, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

३३ १ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
२ मानवपुत्रा, तूं आपल्या बांधवांबरोबर बोल,
त्यांस सांग कीं मी देशावर तरवार आणीन तेव्हां
जर देशांतल्या लोकांनीं आपणांपैकीं एकास निवडून
पहारेकरी नेमिलें, ३ देशावर तरवार येत आहे असें
पाहून शिंग फुंकून त्यानें लोकांस सावध केलें, ४ आणि
त्या शिंगाचा शब्द ऐकून कोणी सावध झाला नाहीं
म्हणून तरवारीनें येऊन त्याला नेलें, तर त्याचें रक्त
त्याच्याच डोक्यावर राहील. ५ शिंगाचा शब्द ऐकून तो
सावध झाला नाहीं म्हणून त्याचें रक्त त्याच्याच डोक्या-
वर राहील; तो सावध झाला असता तर त्यानें आपला
जीव वांचविला असता; ६ पण जर पहारेकऱ्यानें
तरवार येतांना पाहून शिंग वाजविलें नाहीं व लोकांस
सावध केलें नाहीं आणि तरवारीनें येऊन त्यांपैकीं
कोणास नेलें तर तो आपल्या अधर्मानेंच मरेल, तथापि
त्याच्या रक्तपाताचा जाब मी त्या पहारेकऱ्याजवळ
मागेन. ७ तर हे मानवपुत्रा, मीं तुला इस्राएल-
घराण्याचा पहारेकरी नेमिलें आहे; म्हणून तूं माझ्या
तोंडचें वचन ऐकून माझ्या वतीनें त्यांस सावध कर.
८ हे दुर्जना, तूं खास मरशील, असें मी कोणा
दुर्जनास म्हटलें असतां जर त्याला त्याच्या मार्गा-
पासून मागें फिरण्याविषयीं तूं बोलून त्यास सावध केलें
नाहीं तर तो आपल्या अधर्मानेंच मरेल खरा,
पण त्याच्या रक्तपाताचा जाब मी तुजजवळ मागेन.
९ त्या दुर्जनानें आपल्या मार्गावरून मागें फिरावें
म्हणून तूं त्यास सावध केलें असतांहि तो आपल्या
मार्गावरून मागें न फिरल्यास तो आपल्या
अधर्मानेंच मरेल खरा, पण तूं आपल्या जिवाचा
बचाव करशील.

१० हे मानवपुत्रा, तूं इस्राएल घराण्यास सांग,
तुम्ही म्हणतां कीं आमचे अपराध व आमचीं पापें
यांचा भार आम्हांवर आहे व त्यांमुळें आम्ही क्षय
पावत आहों, आम्ही कसे जगणार? ११ त्यांस सांग,
प्रभु परमेश्वर म्हणतो, माझ्या जीविताची शपथ, कोणी
दुर्जन मरावा यांत मला कांहीं संतोष नाहीं तर त्यानें
आपल्या मार्गावरून मागें फिरून जगावें यांत मला
संतोष आहे; फिरा, आपल्या मार्गावरून मागें फिरा;
इस्राएलवंशजहो, तुम्ही कां मरतां? १२ तर हे
मानवपुत्रा, तूं आपल्या बांधवांस सांग, धार्मिक पातक
करील तर त्याची धार्मिकता त्याला मुक्त करणार नाहीं;
आणि दुर्जन आपल्या पापमार्गावरून मागें फिरेल तर
त्याच्या दुष्टतेमुळें त्याचें पतन होणार नाहीं; तसेंच

धार्मिक पाप करूं लागला तर तो आपल्या धार्मिकते-
मुळें वांचणार नाहीं. १३ मी कोणा धार्मिकास
म्हणालों कीं तूं खास वांचशील, आणि त्यानें आपल्या
धार्मिकतेवर भिस्त ठेवून दुष्कर्म केलें तर त्याची सर्व
धार्मिकता जमेस धरण्यांत येणार नाहीं; त्यानें केलेल्या
दुष्कर्मामुळें तो मरेलच. १४ तसेंच मी कोणा
दुर्जनास म्हणालों कीं तूं मरशीलच; तो आपल्या
पापांच्या मार्गावरून मागें फिरून नीति व न्याय आच-
रील; १५ तो दुर्जन गहाण परत करील, हरण केलेलें
परत देईल, आणि कांहींएक अधर्म न करितां जीवनाच्या
नियमांप्रमाणें चालेल तर तो जगेलच, मरावयाचा
नाहीं. १६ त्यानें केलेलीं सर्व पातकें त्याच्या
हिशेबीं धरिलीं जाणार नाहींत; नीतीनें व धार्मिकतेनें
वागत असल्यामुळें तो जगेलच. १७ तरी तुझे बांधव
म्हणतात, प्रभूचा मार्ग नीट नाहीं; पण त्यांचेच मार्ग
नीट नाहींत. १८ कोणी धार्मिक आपल्या धार्मिकतेस
मुकून पाप करूं लागला तर त्यामुळें तो मरेलच.
१९ तथापि दुर्जन आपलें दुराचरण सोडून नीतीनें
व न्यायानें वागला तर त्यामुळें तो वांचेल. २० तरी
पण तुम्ही म्हणतां कीं प्रभूचा मार्ग नीट नाहीं;
अहो इस्राएल वंशजांनो, मी तुमचा प्रत्येकाचा न्याय
तुमच्या मार्गाप्रमाणें करीन.

२१ आमच्या बंदिवासाच्या बाराव्या वर्षी, दहाव्या
महिन्याच्या पंचमीस यरुशलेमाहून एक मनुष्य सुटून
पळून आला, आणि त्यानें सांगितलें कीं नगराचा नाश
झाला आहे. २२ तो पळून आलेला मनुष्य येऊन
पोहचला त्याच्या आदल्या दिवशीं संध्याकाळीं परमे-
श्वराचा वरदहस्त मजवर आला होता; तो मनुष्य सकाळीं
मजकडे आला तों देवानें माझें तोंड उघडिलें होतें.
माझें तोंड उघडलें होतें; तेव्हां मी कांहीं मुका नव्हतों.
२३ तेव्हां परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
२४ मानवपुत्रा, इस्राएल देशाच्या उजाड झालेल्या
प्रदेशांत राहणारे असें म्हणत आहेत कीं अब्राहाम एक
असून त्याला या देशाचें वतन मिळालें, आम्ही तर
बहुत आहों आणि देश आम्हांस वतनादाखल दिला
आहे. २५ यास्तव यांस सांग, प्रभु परमेश्वर असें
म्हणतो कीं तुम्ही रक्तासहित मांस खातां, आपल्या
मूर्तींकडे डोळे लावितां आणि रक्तपात करितां; असले
जे तुम्ही त्या तुम्हांस या देशाचें वतन मिळेल काय?
२६ तुम्ही आपल्या तरवारीवर भरवसा ठेवून अमंगळ
कर्मे करितां, आपल्या शेजाऱ्याची स्त्री भ्रष्ट करितां;
अशा तुम्हांस या देशाचें वतन मिळेल काय? २७ तूं
त्यांस सांग, प्रभु परमेश्वर असें म्हणतो, माझ्या
जीविताची शपथ, उजाड झालेल्या प्रदेशांत राहणारे
तरवारीनें पडतील, उघड्या मैदानांत असलेल्यांस मी
वनपशूंना खावयास देईन, दुर्गांत व गुहांत राहणारे
मरीनें मरतील. २८ मी हा देश ओसाडी व विस्मय
यांचा विषय करीन, त्यांच्या सामर्थ्याचा गर्व जिरेल,
इस्राएलाचे पर्वत वैराण होतील, कोणी त्या वाटेनें
जाणार नाहीं. २९ त्यांनीं केलेल्या सर्व अमंगळ
कृत्यांमुळें मी देश ओसाडी व विस्मय यांचा विषय
करीन, तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.
३० हे मानवपुत्रा, तुझे बांधव भिंतींजवळ, दरवाजां-
जवळ तुझ्याविषयीं बोलत आहेत; एक दुसऱ्याला, भाऊ
भावाला, म्हणतो, चला, परमेश्वराकडून काय वचन
आलें तें ऐकूं या. ३१ जनसभेंतल्याप्रमाणें ते तुजकडे
येऊन माझ्या लोकांच्या रीतीप्रमाणें तुजपुढें बसतात,
ते तुझीं वचनें ऐकतात, पण त्यांप्रमाणें चालत नाहींत;
ते तोंडानें गोडगोड गोष्टी बोलतात पण त्यांचें मन
लोभवश झालें आहे; ३२ आणि पाहा, एकादा मधुर
कंठाचा व वाद्यें चांगलीं वाजविणारा प्रेमगीत गातो
तसा तूं त्यांस वाटतोस कारण ते तुझीं वचनें ऐकतात
पण त्याप्रमाणें चालत नाहींत. ३३ तरी पण हें घडून
येईल, (पाहा, तें आतां घडत आहे,) तेव्हां आप-
ल्यांत एक संदेष्टा होता असें त्यांस समजून येईल.

१ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
३४ २ मानवपुत्रा, इस्राएलाच्या मेंढपाळांविरुद्ध तूं
संदेश देऊन त्यांस सांग; प्रभु परमेश्वर असें
म्हणतो : जे इस्राएलाचे मेंढपाळ आपणच चरतात
त्यांस धिक्कार असो! मेंढपाळांनीं कळपाला चारावें कीं

नाहीं ! ३ तुम्ही मेंढरांचें मांदें खातां, त्यांच्या लोकरी-
चीं वस्त्रें वापरितां; त्यांतलीं लठ्ठलठ्ठ पाहून कापितां,
परंतु कळपाला चारीत नाहीं. ४ तुम्ही निर्बलास बल-
वान करीत नाहीं, रोग्यास बरें करीत नाहीं, घायाळाचे
घाव बांधीत नाहीं, घालवून दिलेल्यास परत आणीत
नाहीं, हरवलेल्यास शोधीत नाहीं; तर तुम्ही त्यांजवर
सक्तीनें व कठकपणें सत्ता चालवितां. ५ त्यांस कोणी
मेंढपाळ नसल्यामुळें त्यांची दाणादाण झाली; तीं सर्व
वनपशूंस भक्ष्य होऊन त्यांची दाणादाण झाली.
६ माझीं मेंढरें सर्व डोंगरांनीं, सर्व उंच टेंकड्यांवरून
भटकत आहेत; देशभर माझीं मेंढरें उधळलीं आहेत;
त्यांची कोणाला शुद्धि नाहीं, कोणी त्यांस शोधीत
नाहीं. ७ यास्तव मेंढपाळहो, तुम्ही परमेश्वराचें
वचन ऐका: ८ प्रभु परमेश्वर म्हणतो, माझ्या
जीविताची शपथ, कोणी मेंढपाळ नसल्यामुळें माझीं
मेंढरें लुटीस गेलीं आहेत; माझीं मेंढरें सर्व वनपशूंस
भक्ष्य झालीं आहेत; माझ्या मेंढपाळांस माझ्या
मेंढरांची शुद्धि नाहीं; मेंढपाळ आपणच चरतात,
पण मेंढरांस चारीत नाहींत. ९ यास्तव मेंढपाळहो,
परमेश्वराचें वचन ऐका; १० प्रभु परमेश्वर म्हणतो,
पाहा, मी मेंढपाळांच्या विरुद्ध आहें, त्यांच्यापासून
मी आपल्या मेंढरांचा हिशेब मागेन; माझा कळप
चारण्याची त्यांस मी बंदी करीन; त्यांला स्वतः
चारावयास मिळणार नाहीं; मी आपलीं मेंढरें त्यांच्या
तोंडांतून सोडवीन म्हणजे यापुढें तीं त्यांस भक्षावयास
सांपडणार नाहींत. ११ कारण प्रभु परमेश्वर
म्हणतो, पाहा, मी स्वतः आपल्या कळपाचा
शोध करीन; त्यांस मी हुडकीन. १२ जो
मेंढपाळ आपल्या दाणादाण झालेल्या मेंढरांमध्यें
राहून त्यांस हुडकितो, त्याच्याप्रमाणें मी आपल्या
मेंढरांस हुडकीन; आणि अभ्राच्छादित व अंधकाराच्या
दिवशीं त्यांची दाणादाण झाली त्या सर्व ठिकाणांतून
त्यांस बचावून आणीन. १३ मी त्यांस राष्ट्रांतून
आणीन, निरनिराळ्या देशांतून त्यांस जमा करीन; मी
त्यांस स्वदेशीं परत आणीन; मी इस्राएलाच्या पर्वतां-
वर, नाल्यांजवळ व देशांतल्या सर्व वसतिस्थानांत
त्यांस चारीन. १४ मी त्यांस चांगल्या चरणींत
चारीन, त्यांची चरण इस्राएलाच्या उंच पहाडांवर होईल;
ते तेथें चांगल्या चरणींत बसतील, इस्राएलाच्या
पर्वतांवर त्यांस उत्तम चारा मिळेल. १५ मी स्वतः
माझा कळप चारीन व त्यांची निजण्याबसण्याची सोय
करीन असें प्रभु परमेश्वर म्हणतो. १६ मी हरवलेल्यास
शोधीन, हाकून दिलेल्यास परत आणीन, घायाळास
पट्टी बांधीन, रोग्यास बळ देईन; पण लठ्ठ व बलिष्ठ
यांचा मी नाश करीन; त्यांस मी यथान्याय चारीन.
१७ प्रभु परमेश्वर म्हणतो, माझ्या कळपा, तुमचें असें
होईल; मी मेंढरांमेंढरांमध्यें, एडक्यांबोकडांमध्यें
निवाडा करीन. १८ तुम्ही चांगला चारा खाऊन शेष
राहिलेला पायांनीं तुडवितां; तुम्ही स्वच्छ पाणी पिऊन
राहिलेलें पायांनीं गढूळ करितां, हें कांहींच नाहीं असें
तुम्हांला वाटतें काय ? १९ माझीं मेंढरें तुमच्या
पायांनीं तुडविलेला चारा खातात व तुमच्या पायांनीं
गढूळ झालेलें पाणी पितात.

२० यास्तव प्रभु परमेश्वर त्यांस म्हणतो, पाहा, मी,
मीच पुष्ट पशु व रोड पशु यांमध्यें निवाडा करीन.
२१ अशक्तांस तुम्ही आपल्या अंगानें व खांद्यानें धक्के
देतां व आपल्या शिंगांनीं हुंदडून हाकून देतां;
२२ म्हणून मी आपल्या कळपाचा बचाव करीन, म्हणजे
ते इतःपर दुसऱ्यांचें भक्ष्य होणार नाहींत; मी मेंढरां-
मेंढरांमध्यें निवाडा करीन. २३ त्यांवर मी एक मेंढपाळ
नेमून त्यांस चारीन; तो कोण तर माझा सेवक
दावीद; तो त्यांस चारील; तो त्यांचा मेंढपाळ
होईल. २४ मी परमेश्वर त्यांचा देव होईन, व
त्यांच्यामध्यें माझा सेवक दावीद अधिपति होईल; मी
परमेश्वर हें बोललों आहें. २५ मी क्षेमवचन देऊन
त्यांजबरोबर करार करीन, देशांतून दुष्ट पशु नाहींतसे
करीन म्हणजे मग ते रानांत निर्भय असे राहतील व
जंगलांत झोप घेतील. २६ मी त्यांस व माझ्या डोंगरा-
भोंवतालच्या स्थळांस मंगलदायक करीन; पाऊस योग्य
ऋतूंत पडेल असें मी करीन; मंगलदायक वृष्टि होईल.

२७ मळ्यांतलीं झाडें फलद्रूप होतील, भूमि आपला
उपज देईल; व ते आपल्या देशांत निर्भयपणें वसतील;
मी त्यांजवरील जोखडांचीं बंधनें तोडून ज्यांनीं
त्यांजकडून दास्य करून घेतलें त्यांच्या हातांतून त्यांस
सोडवीन तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.
२८ ते यापुढें विधर्मी राष्ट्रांस भक्ष्य होणार नाहींत;
वनपशु त्यांस फाडून खाणार नाहींत; तर ते निर्भय
वसतील, कोणी त्यांस भीति घालणार नाहीं.
२९ मी त्यांच्यासाठीं नांवाजण्याजोगी लागवड करीन,
म्हणजे पुनरपि त्यांच्या देशावर दुष्काळ येऊन
त्यांचा ऱ्हास होणार नाहीं; त्यांस पुनः विधर्मी
लोकांकडून अप्रतिष्ठा सोसावी लागणार नाहीं. ३० तेव्हां
मी परमेश्वर त्यांचा देव त्यांजबरोबर आहें व इस्राएल-
घराणें माझी प्रजा आहे हें त्यांस समजेल, असें प्रभु
परमेश्वर म्हणतो. ३१ तुम्ही माझीं मेंढरें, माझ्या
चरणींतला कळप आहां; तुम्ही मानव आणि मी
तुमचा देव आहें, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

३५ १ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें तें
असें : २ मानवपुत्रा, सेईर डोंगराकडे आपलें
तोंड कर व त्याविरुद्ध संदेश दे; ३ त्यास
सांग, प्रभु परमेश्वर म्हणतो, हे सेईर डोंगरा, पाहा,
मीं तुझ्याविरुद्ध आहें; मी आपला हात तुजवर चाल-
वीन आणि तुला वैराण व उद्ध्वस्त करीन. ४ मी तुझीं
नगरें ओस करीन व तूं उजाड होशील; तेव्हां तुला
समजेल कीं मी परमेश्वर आहें. ५ तूं कायमचें वैर धरिलेंस
आणि इस्राएल लोकांवर संकट आलें तेव्हां, त्यांचा पाप-
मूलक अंतसमय आला तेव्हां, त्यांस तरवारीच्या धारेच्या
हवालीं केलें; ६ म्हणून प्रभु परमेश्वर म्हणतो, माझ्या
जीविताची शपथ, मी तुझ्या रक्तपाताची तयारी
करीन, व रक्तपात तुझा पिच्छा पुरवील; तूं रक्तपाता-
विषयीं नापसंती दाखविली नाहीं म्हणून रक्तपात
तुझ्या पाठीस लागेल. ७ मी सेईर डोंगर उद्ध्वस्त व
वैराण करीन; त्यांत येणाऱ्याजाणाऱ्यांचा उच्छेद करीन.
८ त्याच्या वधिलेल्या लोकांनीं मी त्याचे डोंगर व्यापून
टाकीन; तुझ्या टेकड्यांवर, तुझ्या खोऱ्यांत व तुझ्या
नाल्यांत तरवारीनें वधिलेले पडतील. ९ मी तुला
कायमचें उद्ध्वस्त करीन, तुझीं नगरें पुनः वसावयाचीं
नाहींत; तेव्हां तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.
१० हीं दोन राष्ट्रें, हे दोन देश माझे आहेत, आपण
त्यांचा ताबा घेऊं, असें तेथें परमेश्वर असतां तूं
म्हणालास; ११ म्हणून प्रभु परमेश्वर म्हणतो, माझ्या
जीविताची शपथ, तूं जो द्वेष दाखविला, तूं त्यांचा द्वेष
करून जो हेवा प्रगट केला, तदनुसार मी तुजबरोबर
वागेन; मी न्याय करून तुला शासन करीन तेव्हां मी
त्यांस प्रगट होईन. १२ तूं इस्राएलच्या पर्वतांविरुद्ध
म्हणालास कीं ते उद्ध्वस्त झाले आहेत, ते आम्हांस
भक्षावयासाठीं दिले आहेत, हें तुझें सर्व दुर्भाषण मीं
परमेश्वरानें ऐकलें आहे हें तुला कळेल. १३ या
प्रकारें तुम्ही आपल्या तोंडानें मजविरुद्ध आपली
थोरवी मिरविली, मजविरुद्ध हवें तितकें बोललां; तें मीं
ऐकलें आहे; १४ म्हणून प्रभु परमेश्वर म्हणतो, सर्व
पृथ्वी आनंद करीत असतां मी तुला उजाड करीन.
१५ इस्राएल घराण्याचें वतन उद्ध्वस्त झालें तेव्हां
तुला हर्ष वाटला, म्हणून मी तुझेंहि तसेंच करीन; हे
सेईर डोंगरा, तूं वैराण होशील, एकंदर सारा अदोम
ओसाड होईल; तेव्हां त्यांस समजेल कीं मी
परमेश्वर आहें.

३६ १ हे मानवपुत्रा, इस्राएलाच्या पर्वतांत
संदेश देऊन सांग कीं, इस्राएलाच्या पर्वतांनो,
परमेश्वराचें वचन ऐका. २ प्रभु परमेश्वर म्हणतो,
तुमच्यासंबंधानें शत्रु म्हणतात, अहा ! हीं प्राचीन
उंच स्थळें आमच्या ताब्यांत आलीं आहेत; ३ म्हणून
संदेश देऊन सांगा कीं प्रभु परमेश्वर म्हणतो, त्यांनी तुम्हांस
उद्ध्वस्त केलें आहे, राष्ट्रांपैकीं अवशिष्ट राहिलेल्या
लोकांचा तुम्हांवर ताबा असावा म्हणून त्यांनीं तुम्हांस
चोंहोंकडून ग्रासिलें आहे, आणि तुमचें नांव लोकांच्या
तोंडीं झालें आहे व त्यांस तुम्ही निंदेचा विषय झालां
आहां. ४ यास्तव इस्राएलाच्या पर्वतांनो, प्रभु परमेश्वराचें

वचन ऐका; आसपासच्या राष्ट्रांपैकी अवशिष्ट राहिलेल्या
लोकांस लूट व निंदेचा विषय झालेले पर्वत व टेकड्या,
नाले व खोरीं, उजाड व ओसाड नगरें यांस प्रभु पर-
मेश्वर असें म्हणतो कीं, ५ राष्ट्रांपैकी अवशिष्ट राहिलेले
व सगळा अदोम यांनीं उल्लासयुक्त मनानें व द्वेष-
बुद्धीनें माझा देश लुटून फस्त करण्याच्या हेतूनें तो
आपल्या सत्तेंत घेतला; वास्तव मी त्यांजविरुद्ध
ईर्ष्यायुक्त होऊन निश्चितपणें बोललों आहें;
६ इस्राएल देशाविषयीं संदेश देऊन पर्वत व
टेकड्या, नाले, व खोरीं यांस सांग कीं प्रभु परमेश्वर
म्हणतो, विधर्मी राष्ट्रांनीं केलेली अप्रतिष्ठा तुम्हीं
साहिली आहे म्हणून, पाहा, मी आपल्या ईर्ष्येनें व
संतापानें बोललों आहें. ७ ह्यास्तव प्रभु परमेश्वर
म्हणतो, मीं आपला हात उचलिला आहे; तुजभोंव-
तालचीं विधर्मी राष्ट्रें खचित अप्रतिष्ठा पावतील;
८ पण इस्राएलाचे पर्वतहो, तुम्हांवरील वृक्षांस फांद्या
फुटून तुम्ही माझ्या इस्राएल लोकांस फळें घाल असें
लवकरच घडून येईल. ९ कारण पाहा, मी तुम्हांस
अनकूल आहें, मी तुम्हांकडे वळेन व तुम्हांवर
नांगरणीपेरणी होईल; १० मी तुम्हांवर मनुष्यांची,
इस्राएलाच्या एकंदर सर्व घराण्याची, संख्या वाढवीन;
नगरें वसतील, पडीत स्थळें बांधून काढितील.
११ मनुष्य व पशु यांची संख्या मी तुम्हांवर वाढवीन; ते
वृद्धि पावून फलद्रूप होतील; पूर्वींच्याप्रमाणें तुम्हांवर
वस्ती होईल, आणि तुमच्या पूर्वदिवसांत केलें त्यापेक्षां
तुमचें मी अधिक कल्याण करीन; तेव्हां तुम्हांस समजेल
कीं मी परमेश्वर आहें. १२ मनुष्यें, म्हणजे माझे इस्राएल
लोक, तुम्हांवर पुनः येजा करितील असें मी करीन; ते
तुमचा ताबा घेतील, तुम्ही त्यांचें वतन व्हाल, तुम्ही
इतःपर त्यांस अपत्यहीन करणार नाहीं. १३ प्रभु पर-
मेश्वर म्हणतो, ते तुम्हांस म्हणत कीं तूं मनुष्यभक्षक
देश आहेस, तूं आपल्या राष्ट्रास अपत्यहीन केलें आहे;
१४ तर तूं यापुढें मनुष्य भक्षणार नाहींस, आपल्या
राष्ट्रांपुढें अडखुळा ठेवणार नाहींस, असें प्रभु परमेश्वर
म्हणतो. १५ इतःपर मी तुला राष्ट्रांची निंदा ऐकवि-
णार नाहीं, राष्ट्रांनीं केलेली अप्रतिष्ठा तुला सोसावी
लागणार नाहीं; तूं आपल्या राष्ट्रांपुढें अडखुळा ठेवणार
नाहींस असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

१६ परमेश्वराचें वचन मला पुनः प्राप्त झालें कीं,
१७ मानवपुत्रा, इस्राएल घराणें देशांत वस्ती करून
राहिलें तेव्हां त्यांनीं आपल्या आचारानें व कृतींनीं तो
देश भ्रष्ट केला; त्यांचा आचार मजसमक्ष ऋतुमती
स्त्रीच्या विटाळाप्रमाणें होता. १८ त्यांनीं देशांत रक्त-
पात केला व आपल्या मूर्तींनीं तो भ्रष्ट केला, म्हणून
मीं देशावर आपल्या संतापाचा वर्षाव केला; १९ मीं
त्यांची राष्ट्रांमध्यें पांगापांग केली, देशोदेशीं त्यांची
दाणादाण झाली; त्यांच्या आचाराप्रमाणें व कृतींप्रमाणें
मीं त्यांचा न्याय केला. २० ज्या ज्या देशांत ते गेले
तेथें त्यांनीं माझ्या पवित्र नामास बट्टा लाविला; लोक
त्यांच्याविषयीं म्हणत कीं हे परमेश्वराचे लोक आहेत,
हे त्याच्या देशांतून बाहेर निघाले आहेत; २१ परंतु
इस्राएल घराणें ज्या ज्या राष्ट्रांत गेलें तेथें त्यानें माझ्या
पवित्र नामास बट्टा लाविला, तेव्हां मी आपल्या नामास
जपलों. २२ ह्याकरितां इस्राएल घराण्यास सांग कीं, प्रभु
परमेश्वर म्हणतो, हे इस्राएल घराण्या, मी हें तुम्हां-
प्रीत्यर्थ करीत नाहीं, तर तुम्हीं राष्ट्रांराष्ट्रांत जाऊन
माझ्या पवित्र नामास बट्टा लाविला म्हणून माझ्या
नामाप्रीत्यर्थ मी हें करीत आहें. २३ तुम्हीं माझ्या
थोर नामास राष्ट्रांसमोर बट्टा लाविल्यामुळें त्या राष्ट्रांनीं
माझें नाम अपवित्र मानिलें, तें तीं पवित्र मानितील
असें मी करीन; आणि त्या राष्ट्रांच्या देखत
तुमच्या ठायीं मला पवित्र मानितील तेव्हां राष्ट्रांस
समजेल कीं मी परमेश्वर आहें, असें प्रभु परमेश्वर
म्हणतो. २४ कारण मी तुम्हांस राष्ट्रांतून काढून
आणीन, सर्व देशांतून मी तुम्हांस जमा करून
तुमच्या देशांत आणीन. २५ मी तुम्हांवर शुद्ध
पाणी शिंपडीन, म्हणजे तुम्ही शुद्ध व्हाल; तुमची
सर्व मलिनता व तुमच्या सर्व मूर्ति यांपासून

१ मुळांत : तुझा.
२ मुळांत : तूं.

मी तुमची शुद्धि करीन. २६ मी तुम्हांस नवें हृदय देईन, तुमच्या ठायीं नवा आत्मा घालीन; तुमच्या देहांतून पाषाणमय हृदय काढून टाकीन व तुम्हांस मांसमय हृदय देईन. २७ मी तुमच्या ठायीं माझा आत्मा घालीन आणि तुम्ही माझ्या नियमांनीं चालाल, माझे निर्णय पाळून त्यांप्रमाणें आचरण कराल असें मी करीन. २८ मी तुमच्या पूर्वजांस दिलेल्या देशांत तुम्ही वस्ती कराल, आणि तुम्ही माझी प्रजा व मी तुमचा देव असें होईल. २९ मी तुमच्या सर्व मलिनतेपासून तुम्हांस मुक्त करीन; मी धान्यावर हुकूम करून त्याची विपुलता करीन, तुम्हांवर दुष्काळ आणणार नाहीं. ३० वृक्षांचीं फळें व शेतांचा उपज यांची वृद्धि मी करीन, म्हणजे राष्ट्रांमध्यें तुम्हांस यापुढें दुष्काळामुळें होणारी विटंबना भोगावी लागणार नाहीं. ३१ तुम्हांस आपल्या दुष्कर्माचें व अनाचाराचें स्मरण होईल, तुमचे अधर्म व अमंगळ कृत्यें यांमुळें तुमचा तुम्हांलाच वीट वाटेल. ३२ प्रभु परमेश्वर म्हणतो, हें मी तुम्हांप्रीत्यर्थ करीत नाहीं हें तुम्हांस ठाऊक असू द्या; हे इस्राएल घराण्या, तुम्ही आपल्या आचाराविषयीं लज्जित व फजीत व्हा. ३३ प्रभु परमेश्वर म्हणतो, मी तुमचा सर्व अधर्म घालवून तुम्हांस स्वच्छ करीन, तेव्हां नगरें वसतील व पडीत जागा बांधण्यांत येतील असें मी करीन. ३४ आल्यागेल्यांस वैराण दिसणारा प्रदेश नांगरण्यांत येईल. ३५ तेव्हां लोक म्हणतील, ही भूमि वैराण झाली होती ती आतां एदेन बागेसारखी झाली आहे; ओसाड, उजाड व उद्ध्वस्त झालेल्या नगरांची तटबंदी होऊन त्यांत वस्ती झाली आहे. ३६ जीं राष्ट्रें तुमच्यासभोवतीं निभावून राहतील त्यांस समजेल कीं मी परमेश्वर उद्ध्वस्त झालेलीं स्थानें बांधून काढितों, उजाड झालेल्याची लागवड करितों; मी परमेश्वर जें बोललों आहें तें करीनच.

३७ प्रभु परमेश्वर म्हणतो, आणखी मीं असें करावें म्हणून इस्राएल घराण्यास माझी विनवणी करणें भाग पडेल; कळपाप्रमाणें मी त्यांत मनुष्यांची वृद्धि करीन. ३८ पवित्र यज्ञपशूंचा कळप, यरुशलेमांतील सणांचा कळप याप्रमाणें ओसाड नगरें मनुष्यांच्या कळपांनीं भरून जातील; तेव्हां त्यांस समजेल कीं मी परमेश्वर आहें.

३७ १ परमेश्वराचा वरदहस्त मजवर आला; मला परमेश्वराच्या आत्म्याची स्फूर्ति होऊन त्यानें उचलिलें व खोऱ्यांत नेऊन ठेविलें, तेथें अस्थिच अस्थि होत्या; २ त्यानें मला त्यांमधून चोहोंकडून फिरविलें तों पाहा, त्या खोऱ्याच्या जमिनीवर पुष्कळ अस्थि होत्या; त्या अति शुष्क होत्या. ३ मग तो मला म्हणाला, मानवपुत्रा, या अस्थि सजीव होतील काय? मी म्हणालों, प्रभु परमेश्वरा, हें तुलाच ठाऊक; ४ तेव्हां तो मला म्हणाला, या अस्थींविषयीं संदेश देऊन त्यांस म्हण, शुष्क अस्थींनो, परमेश्वराचें वचन ऐका: ५ प्रभु परमेश्वर या अस्थींस म्हणतो, पाहा, मी तुम्हांत श्वास घालितों म्हणजे तुम्ही सजीव व्हाल. ६ मी तुम्हांला स्नायु लावीन, तुम्हांवर मांस चढवीन, तुम्हांस त्वचेनें आच्छादीन, तुम्हांत श्वास घालीन, म्हणजे तुम्ही सजीव व्हाल; आणि तुम्हांस समजेल कीं मी परमेश्वर आहें. ७ मला आज्ञा झाली त्याप्रमाणें मीं संदेश दिला; मी संदेश देत असतां आवाज झाला; आणि पाहा, भूकंप होऊन अस्थींला अस्थि लागून जडल्या. ८ मग मीं पाहिलें तों त्यांवर स्नायु आले, मांस चढलें, त्वचेनें त्यांस आच्छादिलें, पण त्यांत श्वास अगदीं नव्हता. ९ तेव्हां तो मला म्हणाला, वाऱ्याला संदेश दे; मानवपुत्रा, वाऱ्याला संदेश देऊन सांग कीं प्रभु परमेश्वर म्हणतो, हे वाऱ्या, तूं चोहों दिशांनीं ये व या वधिलेल्यांवर फुंकर घाल म्हणजे ते सजीव होतील. १० मला आज्ञा झाल्याप्रमाणें मीं संदेश दिला, तेव्हां त्यांत श्वास येऊन ते सजीव झाले व अतिशय मोठें सैन्य आपल्या पायांवर उभें राहिलें. ११ तेव्हां तो मला म्हणाला, मानवपुत्रा, या अस्थि म्हणजे सारें इस्राएल घराणें होय; पाहा, ते म्हणतात, आमच्या अस्थि शुष्क झाल्या आहेत, आमची आशा नष्ट झाली

१ अथवा: आत्म्याला अथवा श्वासाला

आहे, आमचा साफ उच्छेद झाला आहे; १२ म्हणून
संदेश देऊन त्यांस सांग, प्रभु परमेश्वर म्हणतो,
माझ्या लोकांनो, पाहा, मी तुमच्या कबरा उघडीन,
तुम्हांस आपल्या कबरांतून बाहेर काढून इस्राएल देशांत
आणीन. १३ माझ्या लोकांनो, मी तुमच्या कबरा
उघडून तुम्हांस बाहेर काढीन तेव्हां तुम्हांस समजेल
कीं मी परमेश्वर आहें. १४ मी तुमच्या ठायीं माझा
आत्मा घालीन, तुम्ही सजीव व्हाल व मी तुम्हांस
तुमच्या देशांत वसवीन; तेव्हां मी परमेश्वर हें
बोललों व मीं तसें केलें हें तुम्हांस समजेल, असें
परमेश्वर म्हणतो.

१५ परमेश्वराचें वचन मला पुनः प्राप्त झालें कीं
१६ मानवपुत्रा, तूं लाकडाचा एक ढलपा घेऊन
त्यावर, हा यहूदा व त्याचे सोबती इस्राएल वंशज यांचा,
असें लिही; लाकडाचा दुसरा एक ढलपा घेऊन त्यावर,
हा योसेफाचा म्हणजे एफ्राइम व त्याचे सोबती
सर्व इस्राएल घराणें यांचा ढलपा, असें लिही.
१७ ते ढलपे एकास एक जोडून त्यांचा एक ढलपा
कर; तुझ्या हातीं ते एकजीव होतील असें कर.
१८ मग ह्या ढलप्यांचा अर्थ काय हें आम्हांस तूं
सांगशील ना, असें तुझे बांधव तुला म्हणतील;
१९ तेव्हां त्यांस सांग, प्रभु परमेश्वर म्हणतो, एफ्रा-
इमाच्या हातीं असलेला योसेफाचा ढलपा व त्याचे
सोबती इस्राएल वंशज यांस घेऊन यहूदाच्या ढलप्याशीं
जोडून त्यांचा एक ढलपा मी करीन, म्हणजे ते माझ्या
हातांत एकजीव होतील. २० मग ज्या ढलप्यांवर
तूं लिहिशील ते तूं त्यांच्या डोळ्यांसमोर आपल्या
हातीं धर. २१ तूं त्यांस सांग, प्रभु परमेश्वर म्हणतो,
पाहा, इस्राएल वंशज ज्या राष्ट्रांत गेले आहेत त्यांतून
मी त्यांस काढून व चोहोंकडून गोळा करून स्वदेशीं
नेईन; २२ मी या देशांत, इस्राएलाच्या पर्वतांवर त्यांचें
एक राष्ट्र बनवीन; त्या सर्वांवर एकच राजा राज्य
करील; तीं यापुढें दोन निराळीं राष्ट्रें राहणार नाहींत;
यापुढें तीं विभक्त होऊन त्यांचीं दोन राज्यें होणार
नाहींत; २३ ते आपल्या मूर्तींनीं, आपल्या तिर-
स्करणीय वस्तूंनीं व आपल्या कोणत्याहि पातकांनीं
आपणांला विटाळविणार नाहींत; त्यांनीं आपल्या
ज्या सर्व निवासस्थानीं[1] पाप केलें त्या सर्वांतून त्यांस
सोडवून मी शुद्ध करीन; म्हणजे ते माझे लोक व मी
त्यांचा देव असें होईल. २४ माझा सेवक दावीद त्यांज-
वर राजा होईल, त्या सर्वांचा एकच मेंढपाळ होईल;
ते माझ्या निर्णयांप्रमाणें चालतील आणि माझे नियम
पाळून त्यांप्रमाणें वर्ततील. २५ जो देश माझा सेवक
याकोब यास मीं दिला व ज्यांत तुमचे पूर्वज राहत
असत त्यांत ते वस्ती करितील; तेथें ते व त्यांचे पुत्र-
पौत्र सर्वकाळ वस्ती करितील; माझा सेवक दावीद
त्यांजवर सर्वकाळचा अधिपति होईल. २६ आणखी मी
त्यांजबरोबर शांततेचा करार करीन, तो करार सर्वकाळचा
होईल; मी त्यांस वसवीन, त्यांची संख्या वाढवीन,
आणि सर्वकाळ राहील असें माझें पवित्रस्थान त्यांच्यामध्यें
स्थापीन. २७ माझा निवासमंडप त्यांच्यावर राहील; मी
त्यांचा देव व ते माझे लोक असें होईल. २८ माझें
पवित्रस्थान त्यांच्यामध्यें सर्वकाळ राहील, तेव्हां
राष्ट्रांस समजेल कीं इस्राएलास पवित्र करणारा मी
परमेश्वर आहें.

३८ १ परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं,
२ मानवपुत्रा, मागोग देशांतील गोग, जो
रोश, मेशेख व तुबाल यांचा अधिपति, त्याज-
कडे आपलें मुख करून त्याजविरुद्ध संदेश दे; ३ त्यास
सांग, प्रभु परमेश्वर म्हणतो, पाहा, अरे गोगा, रोश,
मेशेख व तुबाल यांच्या अधिपति, मी तुजविरुद्ध
आहें. ४ मी तुला पळ काढावयाला लावीन; तुझ्या
जाभाडांत गळ टोचून तुला बाहेर काढीन; तुझें सर्व सैन्य,
घोडे व स्वार यांस बाहेर काढीन; सर्व जण सुंदर पोशाख
ल्यालेले, कवच व ढाल धारण केलेले, तरवारी परजणारे
अशांचा तो मोठा समूह आहे; ५ त्यांसह ढाल व शिरस्त्राण
धारण केलेले पारस, कूश व पूट, ६ गोमर व त्याचा सेनासमूह,

[1] पाठभेद: धर्मभ्रष्टतेमध्यें

आणि उत्तरेकडील तोगार्मांचें घराणें व त्याचा सर्व
सेनासमूह, तसेच अनेक जातींचे लोक यांस तुजसह
बाहेर काढीन.
७ तूं व तुझ्या पक्षाकडे जमा झालेले सर्व समूह असे
तुम्ही तयार व्हा, तयार व्हा; तूं त्यांचा नायक हो.
८ बहुत दिवस लोटल्यावर तुझा समाचार घेण्यांत येईल;
शेवटल्या वर्षी जो देश तरवारीपासून बचावेल व ज्या
देशांत अनेक राष्ट्रांतून जमा केलेले लोक पुनःपुनः उद्-
ध्वस्त होत असलेल्या इस्राएल पर्वतांवर वस्ती करतील,
त्या देशावर तूं चढाई करिशील; तथापि त्या लोकांस
राष्ट्रांतून बाहेर आणिलें असून ते सर्व निर्भय राहतील. ९
तूं तुफानासारखा चालून येशील, भूमीला मेघ झाकितो
त्यासारखा तूं होशील; तूं, तुझे सर्व सेनासमूह व तुज-
सह अनेक राष्ट्रांचे लोक, असे तुम्ही सर्व याल.
१० प्रभु परमेश्वर म्हणतो, त्या दिवशीं असें होईल
कीं तुझ्या मनांत कल्पना येतील आणि तूं दुष्ट युक्ति
योजिशील. ११ तूं म्हणशील, ज्या प्रदेशांतील गांवांला
तटबंदी नाहीं त्यांवर मी चढाई करीन; जे स्वस्थपणें
निर्भय राहत आहेत, व ज्यांपैकीं कोणालाहि कोट, अड-
सर, वेशी वगैरे कांहीं नाहींत त्यांजवर मी चालून जाईन;
१२ लोकांची मालमत्ता हरावयासाठीं व लुटालूट कराव-
यासाठीं; ज्या ओसाड ठिकाणीं पुनः वस्ती झाली आहे
त्यांवर माझा हात चालवावा, आणि निरनिराळ्या राष्ट्रांतून
जमा केलेल्या ज्या लोकांनीं गुरेंढोरें व मालमत्ता संपादन
केली आहे व जे पृथ्वीच्या मधल्या प्रदेशीं राहत आहेत
त्यांजवर हात चालवावा म्हणून मी चालून जाईन. १३
शबा, ददान आणि तार्शीश येथले व्यापारी व त्यांचे सर्व
तरुण सिंह तुला म्हणतील, तूं लुटालूट करावयास आलास
काय? तूं मालमत्ता हरण करण्यासाठीं आपला सेनासमूह
जमविला आहे काय? सोनेंरुपें न्यावें, गुरेंढोरें व माल न्यावा
आणि मोठी लूट करावी म्हणून तूं आला आहेस काय?
१४ यास्तव हे मानवपुत्रा, संदेश देऊन गोगाला
सांग, प्रभु परमेश्वर म्हणतो, जेव्हां माझे लोक इस्रा-
एल निर्भय वसतील तेव्हां हें तुला कळणार नाहीं
काय? १५ तूं आपल्या स्थानाहून येशील; उत्तरेकडल्या
दूरदूरच्या देशांतून अश्वारूढ झालेला मोठा लोक-
समुदाय, मोठा दळभार, तूं बरोबर घेऊन येशील;
१६ अभ्रानें देश झाकावा तसा तूं माझे लोक इस्रा-
एल यांवर चाल करून येशील; हे गोगा, शेवटल्या
दिवसांत असें घडेल कीं मी राष्ट्रांदेखत तुझ्या द्वारें
आपली पवित्रता प्रगट करीन; तेव्हां राष्ट्रांनीं मला
ओळखावें म्हणून मी तुला माझ्या देशावर आणीन.
१७ प्रभु परमेश्वर म्हणतो, माझे सेवक जे इस्राएलाचे
संदेष्टे त्यांच्या द्वारें पूर्वकाळीं ज्याविषयीं मी बोललों
होतों आणि त्या काळीं बहुत वर्षें त्यांनीं ज्याविषयीं
असा संदेश दिला होता कीं मी तुला त्यांजवर चाल
करण्यास आणीन, तो तूंच ना? १८ प्रभु परमेश्वर
म्हणतो, गोग इस्राएल देशावर चाल करील त्या दिवशीं
असें होईल कीं माझ्या नाकपुड्या क्रोधानें फुरफुरतील.
१९ कारण मी ईर्ष्येनें, क्रोधाग्नीनें तप्त होऊन बोललों
आहें कीं खरोखर त्या दिवशीं इस्राएल देशांत मोठा
भूकंप होईल; २० समुद्रांतील मासे, आकाशांतील
पक्षी, वनांतले पशु, जमिनीवर रांगणारे सर्व
प्राणी व भूमीवर राहणारीं सर्व मनुष्यें माझ्यापुढें
थरथर कांपतील; पर्वत नष्ट होतील, कडे खचतील,
हरएक कोट कोसळून जमीनदोस्त होईल. २१ प्रभु
परमेश्वर म्हणतो, माझ्या सर्व पर्वतांकडे त्याजविरुद्ध
मी तरवार बोलावीन; प्रत्येकाची तरवार आपल्या
भावावर चालेल. २२ मरी व रक्तपात यांनीं मी
त्याजबरोबर वाद मांडीन; त्याजवर, त्याच्या सैन्यांवर
पाऊस, मोठ्या गारा, अग्नि व गंधक यांची वृष्टि मी
त्याजबरोबर असलेल्या अनेक लोकसमूहांवर धोधो
करीन. २३ या प्रकारें मी आपला महिमा व
पवित्रता प्रगट करीन, आणि बहुत राष्ट्रांस माझी
प्रत्यक्ष ओळख होईल; तेव्हां त्यांस समजेल कीं मी
परमेश्वर आहें.

३९ १ हे मानवपुत्रा, गोगाविरुद्ध संदेश देऊन
सांग, प्रभु परमेश्वर म्हणतो, हे गोगा, रोश,
मेशेख व तुबाल यांच्या अधिपती, पाहा, मी
तुजविरुद्ध आहें; २ मी तुला फिरवीन, तुला घेऊन

आईन, उत्तरेच्या अतिशयित दूर प्रदेशांतून तुला
जामवास आणीन, तुला इस्राएलाच्या पर्वतांकडे आणीन;
३ मी तुझ्या डाव्या हातांतलें धनुष्य उडवून देईन;
तुझ्या उजव्या हातांतले बाण खालीं पाडीन. ४ तूं
इस्राएलाच्या पर्वतांवर पडशील; तूं, तुझे सर्व सेनासमूह
आणि तुजबरोबर असलेले लोकसमूह, हे तुम्ही
सगळे पडाल; मी तुम्हांला नाना प्रकारच्या हिंस्र
पक्ष्यांस व वनपशूंस भक्ष्यार्थ देईन. ५ उघड्या मैदानांत
तूं पडशील, कारण मी हें बोललो आहें, असें प्रभु
परमेश्वर म्हणतो. ६ मी मागोगांत व द्वीपांत निर्भय
राहणाऱ्या लोकांत अग्नि पाठवीन; तेव्हां त्यांस समजेल
कीं मी परमेश्वर आहें. ७ मी आपल्या इस्राएल लोकांत
माझें पवित्र नाम प्रगट करीन; इतःपर आपल्या पवित्र
नामाची अप्रतिष्ठा मी होऊं देणार नाहीं; तेव्हां मी
परमेश्वर, इस्राएलाचा पवित्र प्रभु आहें असें राष्ट्रांला
समजून येईल. ८ पाहा, हें प्राप्त होत आहे, घडून येत
आहे; मीं सांगितला तो हा दिवस आहे, असें प्रभु
परमेश्वर म्हणतो. ९ तेव्हां इस्राएली नगरांतले रहि-
वासी बाहेर निघून ढाली व कवचें, धनुष्यें व बाण,
गदा व भाले इत्यादि शस्त्रास्त्रांस आग लावून
जाळितील; त्यांचें त्यांना सात वर्षे सरपण होईल;
१० ते रानांतून लाकडें आणणार नाहींत, जंगलांतलें
लाकूड तोडणार नाहींत; तर हीं शस्त्रें ते जाळितील;
त्यांस ज्यांनीं लुटिलें त्यांस ते लुटितील व त्यांस ज्यांनीं
नागविलें त्यांस ते नागवितील असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

११ त्या दिवशीं असें होईल कीं मी समुद्राच्या
पूर्वतीरीं असलेलें प्रवाशांचें खोरें गोगास इस्राएलदेशांत
कबरस्तान म्हणून देईन; तें येणाऱ्याजाणाऱ्यांची वाट
अडवील; तेथें गोग व त्याचा सर्व लोकसमूह यांस
पुरितील, आणि त्यास हमोन-गोग (गोगाचा लोकसमु-
दाय) याचें खोरें असें म्हणतील. १२ देश शुद्ध करण्या-
साठीं इस्राएल घराणें त्यांस सात महिने पुरीत राहील. १३
देशांतले सर्व लोक त्यांस पुरितील; मी आपला महिमा
प्रगट करीन त्या दिवशीं हें त्यांच्या कीर्तीस कारण
होईल, असें प्रभु परमेश्वर म्हणतो. १४ हें काम नेहमीं
करणारे इसम ते वेगळे करून नेमितील; आणि देश
शुद्ध व्हावा म्हणून ते इसम देशभर हिंडून जमिनीवर
पडून राहिलेल्या उरल्यासुरल्या लोकांस पुरितील;
सात महिने लोटल्यावर ते शोधाला लागतील.
१५ शोध करणारे देशांतून हिंडत असतां कोणाला
मनुष्याची अस्थि आढळली तर पुरणाऱ्यांनीं ती
हमोन-गोगच्या खोऱ्यांत नेऊन पुरावी म्हणून तेथें
निशाणी करून ठेवितील. १६ एका नगराचें नांवहि
हमोना (समुदाय) असें ठेवितील; अशा प्रकारें ते
देशाची शुद्धि करितील.

१७ प्रभु परमेश्वर म्हणतो, हे मानवपुत्रा, हर-
तऱ्हेच्या पक्ष्यांस व वनपशूंस सांग कीं जमा व्हा; या,
मी तुम्हांसाठीं यज्ञबलि कापीत आहें, इस्राएलाच्या
पर्वतांवर महायज्ञ करीत आहें; तेथें चोहोंकडून एकत्र
होऊन मांस खा, रक्त प्या. १८ तुम्ही वीरांचें मांस
खाल, पृथ्वीचे अधिपति आणि मेंढे, कोकरें, बोकड
व बैल यांचें रक्त प्याल; हीं सर्व बाशान डोंगरांत पोस-
लेलीं आहेत. १९ तुम्हांसाठीं कापलेल्या माझ्या यज्ञ-
पशूंची वपा तुम्ही तृप्ति होईपर्यंत खाल व त्यांचें रक्त
पिऊन मस्त व्हाल. २० माझ्या मेजावर बसून घोडे
व स्वार, वीर व सर्व प्रकारचे योद्धे यांस खाऊन
तुमची तृप्ति होईल, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

२१ तेव्हां राष्ट्रांमध्यें मी आपला महिमा स्थापीन;
त्यांना शासन करीन व आपला हात त्यांजवर टाकीन,
हें सगळीं राष्ट्रें पाहतील. २२ त्या दिवसापासून पुढें
मी परमेश्वर त्यांचा देव असें इस्राएलाच्या घराण्यास
समजेल. २३ राष्ट्रांस समजेल कीं इस्राएल घराण्यांतील
लोक आपल्या दुष्टतेमुळें बंदिवासांत गेले; त्यांनीं
मजबरोबर विश्वासघात केला म्हणून मी त्यांपासून
आपलें मुख लपविलें आणि त्यांस त्यांच्या वैऱ्यांच्या
हवालीं केलें, तेव्हां ते सर्व तरवारीनें पडले. २४ त्यांच्या
अशुद्धतेप्रमाणें, त्यांच्या अपराधांप्रमाणें, मी त्यांज-
बरोबर वर्तलों आणि त्यांपासून आपलें मुख लपविलें.

२५ यास्तव प्रभु परमेश्वर म्हणतो, आतां मी
याकोबाचा बंदिवास उलटवीन, आणि इस्राएलाच्या

अवघ्या घराण्यावर दया करीन; माझ्या पवित्र नामाची
ईर्ष्या धरीन. २६ ते देशांत निर्भय वसतील व कोणी
त्यांस धाक घालणार नाहीं; मग ते लज्जित होतील;
मजबरोबर केलेल्या विश्वासघाताचा त्यांस पस्तावा वाटेल.
२७ मी त्यांस राष्ट्रांतून परत आणीन, त्यांच्या शत्रूंच्या
देशांतून त्यांस जमा करीन व बहुत राष्ट्रांसमक्ष त्यांच्या-
ठायीं मी आपली पवित्रता प्रगट करीन, तेव्हां हें
घडेल. २८ मी त्यांस राष्ट्रांमध्यें हाकून देऊन पुन:
मींच त्यांस त्यांच्या देशीं परत आणिलें; त्यांच्यापैकीं
कोणालाहि अत:पर मी परदेशांत राहूं देणार नाहीं, हें
पाहून मी परमेश्वर आहें असें ते समजतील; २९ मी
आपलें मुख यापुढें त्यांपासून लपविणार नाहीं; कारण
मीं आपल्या आत्म्याची इस्राएल घराण्यावर वृष्टि केली
आहे, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

१ आमच्या बंदिवासाच्या पंचविसाव्या
४० वर्षी, म्हणजे नगराचा विध्वंस झाल्यावर
चौदाव्या वर्षी, वर्षारंभाच्या महिन्याच्या दशमी-
सच परमेश्वराचा वरदहस्त मजवर आला व त्यानें
मला तेथें नेलें. २ त्यानें दिव्य दृष्टांतांच्या द्वारें मला
इस्राएल देशांत नेऊन एका अतिशयित उंच पर्वतावर
ठेविलें; त्यावर दक्षिणेस नगराच्या आकारासारखें कांहीं
होतें. ३ त्यानें मला त्या जागीं नेलें तों एक पुरुष
दिसला; त्याचें स्वरूप पितळेसारखें होतें; त्याच्या
हातांत तागाची एक दोरी व मापण्याची काठी होती;
तो वेशीनजीक उभा होता. ४ तो पुरुष मला म्हणाला,
मानवपुत्रा, आपल्या डोळ्यांनीं पाहा, आपल्या कानांनीं
ऐक, व मी तुला जें कांहीं दाखवितों त्या सर्वांकडे
चित्त लाव; हें तुला दाखवावें म्हणून मीं तुला
इकडे आणिलें आहे; तूं जें पाहशील तें सर्व इस्राएल
घराण्यास सांग.

५ मीं पाहिलें तों त्या मंदिराभोवतीं एक तट होता;
त्या पुरुषाच्या हातांत मापण्याची एक काठी होती; ती सहा
हात लांबीची होती; हें माप एक हात व चार
अंगुळें होतें. त्यानें त्या इमारतीच्या भिंतीची जाडी
एक काठी व उंची एक काठी मापिली. ६ तो पूर्वाभि-
मुख असलेल्या द्वाराकडे जाऊन पायऱ्या चढून वर
गेला; त्यानें द्वाराचा उंबरठा एक काठी रुंद मापिला;
हा पहिला उंबरठा एक काठी भरला. ७ प्रत्येक चौकी
एक काठी लांब व एक काठी रुंद असून त्या चौक्यां-
मधील अंतर पांच हात होतें; मंदिरासमोरील देवडी-
जवळच्या द्वाराचा उंबरठा एक काठी होता. ८ मंदिरा-
कडल्या द्वाराची देवडी त्यानें एक काठी मापिली. ९ त्यानें
त्या द्वाराच्या देवडीचें माप घेतलें तें आठ हात भरलें;
तिचे खांब दोन हात भरले; ही द्वाराची देवडी
मंदिरासमोर होती. १० पूर्वेकडील द्वाराच्या या बाजूला
व त्या बाजूला तीन तीन चौक्या होत्या; त्या तिहींचें
माप सारखेंच असून दोन्ही बाजूंचे खांबहि एकाच
मापाचे होते. ११ त्यानें द्वाराच्या प्रवेशमार्गाची रुंदी
दहा हात व द्वाराची लांबी तेरा हात मापिली; १२ त्या
चौक्यांच्या पुढची जागा एका बाजूला एक हात व
दुसऱ्या बाजूला एक हात होती; त्या चौक्या दोन्ही
बाजूंला सहा सहा हात होत्या. १३ त्यानें एका
चौकीच्या छावणीपासून दुसरीच्या छावणीपर्यंत दाराला
दार धरून पंचवीस हात रुंदी मापिली. १४ त्यानें
देवडीचें माप घेतलें तें वीस हात भरलें; त्या देवडीला
लागून द्वाराभोवतीं अंगण होतें. १५ प्रवेशद्वारापासून
आंतील द्वाराच्या देवडीच्या पुढल्या भागापर्यंत पन्नास
हात भरले. १६ त्या चौक्यांला व द्वारांच्या आंतल्या
बाजूंस त्यांच्या खांबांला झरोके होते; भिंतीच्या महि-
रापींसहि झरोके होते; असे आंतल्या चोहों बाजूंला
झरोके होते, व खांबांवर खजुरीचीं झाडें कोरिलेलीं
होतीं.

१७ तेव्हां त्यानें मला बाहेरील अंगणांत नेलें तों
तेथें सभोवार खोल्या असून त्या अंगणांत चिरेबंदी
केली होती असें दृष्टीस पडलें; त्या चिरेबंदीवर तीस
खोल्या होत्या. १८ ही चिरेबंदी म्हणजे अथात्

१ पाठभेद: खांबहि साठ साठ हात मापिले;
२ पाठभेद: खांबास; ३ अथवा: देवडी; या
शब्दाचा हा दुसरा अर्थ या अध्यायांत सर्वत्र समजावा.

खालची चिरेबंदी द्वाराला लागून त्यांच्या लांबीइतकी होती. १९ तेव्हां त्यानें खालच्या द्वारापासून आंतील अंगणापर्यंत रुंदी मोजिली ती पूर्व व उत्तर बाजूस शंभर हात भरली.

२० मग त्यानें बाहेरल्या अंगणाला लागून उत्तराभिमुख असलेल्या द्वाराची लांबीरुंदी मोजिली. २१ त्याच्या चौक्या ह्या बाजूला तीन व त्या बाजूला तीन होत्या; त्याचे खांब व महिरापी हीं पहिल्या द्वाराच्या मापाप्रमाणें होतीं; त्याची लांबी पन्नास हात व रुंदी पंचवीस हात होती. २२ त्याचे झरोके, महिरापी व कोरलेलीं खजुरीचीं झाडें हीं पूर्वाभिमुख असलेल्या द्वाराच्या मापाप्रमाणें होतीं; त्यावर चढून जाण्यासाठीं सात पायऱ्या होत्या, व त्यांसमोर त्याच्या महिरापी होत्या. २३ आंतल्या अंगणांत पूर्वेकडच्या द्वारासारखें उत्तरेकडच्या द्वारासमोर एक द्वार होतें; एका द्वारापासून दुसऱ्या द्वारापर्यंत त्यानें शंभर हात मापिले.

२४ मग त्यानें मला दक्षिणभागीं नेलें, तों तेथें दक्षिणाभिमुख एक द्वार दृष्टीस पडलें; त्याचे खांब व महिरापी त्यानें मापिल्या त्या पूर्वीच्या इतक्या भरल्या. २५ वर सांगितलेल्या झरोक्यांप्रमाणें यासहि सभोवार झरोके व महिरापी होत्या; त्याची लांबी पन्नास हात व रुंदी पंचवीस हात होती; २६ त्यावर चढून जाण्यास सात पायऱ्या होत्या व त्यांसमोर त्याच्या महिरापी होत्या; व त्याच्या खांबावर अलीकडेपलीकडे एकएक खजुरीचें झाड कोरिलें होतें. २७ दक्षिणेकडे आंतल्या अंगणाला द्वार होतें; दक्षिणेकडल्या ह्या द्वारापासून त्या द्वारापर्यंत शंभर हात भरले.

२८ तेव्हां त्यानें मला दक्षिणद्वारानें आंतल्या अंगणांत नेऊन दक्षिणद्वार मापिलें, तें तितकेंच भरलें; २९ त्याप्रमाणेंच त्यानें त्याच्या चौक्या, खांब व त्यांवरल्या महिरापी हीं मापिलीं, तीं तेवढींच भरलीं; त्याला व त्याभोवतालच्या महिरापींला झरोके होते; त्याची लांबी पन्नास हात व रुंदी पंचवीस हात भरली. ३० त्याला सभोवार महिरापी होत्या; त्या एकंदर पंचवीस हात लांब व पांच हात रुंद होत्या. ३१ त्याच्या महिरापी बाहेरल्या अंगणाच्या बाजूला होत्या; त्याच्या खांबांवर खजुरीचीं झाडें कोरिलीं होतीं; त्यावर चढून जाण्यास आठ पायऱ्या होत्या.

३२ मग त्यानें मला पूर्वेकडल्या आंतील अंगणांत नेऊन तें द्वार मापिलें, तें तेवढेंच भरलें; ३३ त्याच्या चौक्या, खांब व महिरापी त्यानें मापिल्या, त्याहि तेवढ्याच भरल्या; त्याला सभोवार झरोके व महिरापी होत्या; त्याची लांबी पन्नास हात व रुंदी पंचवीस हात होती. ३४ त्याच्या महिरापी बाहेरील अंगणाच्या बाजूला होत्या; त्याच्या खांबांवर अलीकडेपलीकडे खजुरीचीं झाडें कोरिलीं होतीं; त्यावर चढून जाण्यास आठ पायऱ्या होत्या.

३५ मग त्यानें मला उत्तरद्वाराकडे नेलें; तेंहि त्यानें मापिलें व तें तितकेंच भरलें. ३६ त्याच्या चौक्या, खांब व महिरापी त्यानें मापिल्या; त्याला सभोवार झरोके होते; त्याची लांबी पन्नास हात व रुंदी पंचवीस हात होती. ३७ त्याचे खांब बाहेरील अंगणाच्या बाजूला होते; त्यांवर अलीकडेपलीकडे खजुरीचीं झाडें कोरिलीं होती; त्यावर चढून जाण्यास आठ पायऱ्या होत्या.

३८ द्वारांजवळ खांबांना लागून एकएक खोली असून तिला दार होतें; तेथें होमबलि धूत असत. ३९ द्वाराच्या देवडींत होमार्पण, पापार्पण व दोषार्पण यांचे पशु कापण्यासाठीं ह्या बाजूला दोन व त्या बाजूला दोन अशीं मेजें होतीं. ४० आणि बाहेरच्या अंगास, उत्तराभिमुख असलेल्या द्वाराच्या प्रवेशमार्गी चढून जाण्याच्या वाटेवर दोन मेजें होतीं; तसेंच दुसऱ्या अंगास द्वाराच्या देवडीनजीक दोन मेजें होतीं. ४१ द्वाराच्या बाहेरील अंगाला दोन्ही बाजूंस चार चार मेजें होतीं; अशीं यज्ञपशु कापण्यासाठीं आठ मेजें होतीं. ४२ होमार्पणासाठीं ताशींव दगडांचीं चार मेजें होतीं; तीं दीड हात लांब, दीड हात रुंद व एक हात उंच अशीं होतीं; ज्या हत्यारांनीं होमबलि व इतर यज्ञपशु कापीत तीं त्यांवर ठेवीत असत. ४३ चार अंगुलें लांबीच्या आंकड्या मंदिरांत सभोवार लावलेल्या होत्या; यज्ञपशूंचें मांस त्या मेजांवर ठेवीत असत.

४४ आंतील द्वाराच्या बाहेर, आंतील अंगणांत
दोन खोल्या होत्या, एक उत्तरद्वाराच्या बाजूस दक्षिणा-
भिमुख होती व दुसरी दक्षिणद्वाराच्या बाजूस उत्तराभि-
मुख होती. ४५ तो मला म्हणाला, ही दक्षिणाभिमुख
असलेली खोली या मंदिराचें रक्षण करणाऱ्या याजकांसाठीं
आहे; ४६ आणि उत्तराभिमुख असलेली खोली वेदीचें
रक्षण करणाऱ्या याजकांसाठीं आहे; ते सादोकाचे
वंशज होत; ते लेवीच्या वंशांतले असून परमेश्वरा-
समीप सेवा करण्यासाठीं जातात. ४७ त्यानें अंगण
मापिलें तें शंभर हात लांब व शंभर हात रुंद असें
चौरस भरलें; आणि मंदिरासमोर वेदी होती.

४८ मग त्यानें मला मंदिराच्या देवडींत नेलें व त्या
देवडीचा प्रत्येक खांब मापिला तो एका बाजूनें पांच हात
व दुसऱ्या बाजूनें पांच हात भरला; त्या द्वाराची रुंदी
एका बाजूनें तीन हात व दुसऱ्या बाजूनें तीन हात
भरली. ४९ देवडीवर चढून जाण्यास पायऱ्या होत्या, त्या
बाजूनें तिची लांबी वीस हात व रुंदी अकरा[1] हात
भरली; त्या खांबांच्या एका बाजूला एक व दुसऱ्या
बाजूला एक असे लहान खांब होते.

४१ १ नंतर त्यानें मला मंदिराच्या गाभाऱ्यांत
नेलें; त्यानें तेथले खांब मापिले तों त्यांची रुंदी
एका बाजूस सहा हात व दुसऱ्या बाजूस सहा
हात भरली; या गाभाऱ्याची रुंदी मंडपाच्या इतकी
होती. २ द्वाराची रुंदी दहा हात होती, आणि त्याची
एक बाजू पांच हात व दुसरी पांच हात होती;
त्यानें गाभाऱ्याची लांबी चाळीस हात व रुंदी वीस
हात मापिली. ३ मग आंत जाऊन त्यानें दरवाजाचा
प्रत्येक खांब मापिला तो दोन हात भरला; दरवाजाची
उंची सहा हात व रुंदी सात हात भरली. ४ त्यानें
गाभाऱ्यासमोरच्या जागेची लांबी वीस हात व
रुंदी वीस हात मापिली; तो मला म्हणाला, हें परम-
पवित्रस्थान होय.

५ त्यानें मंदिराची भिंत सहा हात मापिली;
मंदिरासभोवतीं प्रत्येक बाजूस खोल्या होत्या
त्या प्रत्येकीची रुंदी चार हात भरली. ६ बाजूस अस-
लेल्या खोल्या एकीवर एक अशा तीन मजली असून
त्या रांगेनें तीस होत्या; मंदिराच्या आसपास असलेल्या
खोल्यांसाठीं जी भिंत होती तिला त्या लागलेल्या होत्या,
तरी मंदिराच्या भिंतीला त्या लागलेल्या नव्हत्या.
७ बाजूच्या कोठड्या इमारतीच्या सभोवार वरवर
गेल्या तसतशा त्या रुंद होत गेल्या, आणि सभोव-
तालचा भाग वरवर गेला तसतसा तो रुंद होत गेला;
म्हणून या इमारतीची रुंदी वरचे बाजूस अधिक होती,
अशी ती रुंदी खालच्यापेक्षां मधल्या मजल्यांत व
तेथल्यापेक्षां वरच्या मजल्यांत वाढत गेली. ८ मंदिराला
उंच पाया होता असें मीं पाहिलें; बाजूंच्या कोठड्यांचे
पाये सहा मोठ्या हातांची एक काठी भरले. ९ बाजूच्या
कोठड्यांच्या बाहेरील भिंतीची जाडी पांच हात होती;
मंदिराच्या बाजूच्या कोठड्यांस लागून एक[1] जागा खुली
राहिली होती. १० खोल्यांबाहेर मंदिराच्या आसपास वीस
हातांचें अंतर होतें. ११ बाजूच्या कोठड्यांचे दरवाजे
खुल्या जागेकडे होते; एक दरवाजा उत्तरेकडे व दुसरा
दरवाजा दक्षिणेकडे होता; ह्या खुल्या जागेची रुंदी
चोहोंकडून पांच हात होती.

१२ मंदिराच्या पश्चिमेस सोडलेल्या जागेसमोर जी इमा-
रत होती तिची रुंदी सत्तर हात होती, तिची भिंत चोहों-
कडून पांच हात जाड होती, व तिची लांबी नव्वद हात होती.
१३ त्यानें मंदिर शंभर हात मापिलें; आणि ती सोड-
लेली जागा व भिंतींसह इमारत हीं शंभर हात लांब
भरली. १४ मंदिराची पुढली बाजू व पूर्वेकडील सोड-
लेली जागा यांची रुंदी शंभर हात होती.

१५ मंदिरामागें असलेल्या त्या सोडलेल्या
जागेपुढल्या इमारतीची लांबी व दोन्ही बाजूंस अस-
लेले सज्जे, आंतला गाभारा व अंगणांतील देवड्या हीं
सगळीं त्यानें शंभर हात मापिलीं; १६ तीनहि मज-
ल्यांवर असलेले द्वारांचे उंबरठे, झरोके आणि उंबरठ्या-
भोवतालचे सज्जे यांस तक्तपोशी होती; जमिनीपासून

१ **पाठभेद :** बारा

१ **पाठभेद :** जी जागा खुली राहिली होती तीहि पांच हात भरली.

झरोक्यांपर्यंत भिंतीला तक्तपोशी केली होती व झरोकेहि
मढून काढिले होते; १७ मंदिरांतल्या व बाहेरल्या
बाजूची द्वारावरची जागा, समोवतालच्या भिंतीचें
आंतलें व बाहेरलें अंग ही सगळी योग्य प्रमाणांत होती.
१८ त्यांवर करूब व खजुरीचीं झाडें कोरिलीं होतीं;
दोन दोन करूबांमध्यें एक एक खजुरीचें झाड होतें,
व प्रत्येक करूबाला दोन तोंडें होतीं; १९ करूबाला
एक खजुरीच्या झाडाकडे मनुष्याचें मुख व दुसऱ्या
खजुरीच्या झाडाकडे तरुण सिंहाचें मुख होतें; मंदिरा-
वर चोहोंकडे अशा प्रकारचें काम होतें. २० जमिनी-
पासून दरवाजांच्या वरल्या भागापर्यंत गाभाऱ्याच्या
भिंतीवर करूब व खजुरीचीं झाडें कोरिलीं होतीं.

२१ गाभाऱ्यांच्या द्वारांचे खांब चौरस होते; परमपवित्र-
स्थानाच्या पुढल्या बाजूचें स्वरूप गाभाऱ्याच्या सारखेंच
होतें. २२ वेदी लाकडाची असून तीन हात उंच व
दोन हात लांब होती, तिचे कोपरे, तिची बैठक व तिच्या
भिंती लाकडाच्या होत्या; त्यानें मला म्हटलें, परमेश्वरा-
पुढें असणारें हें मेज आहे. २३ गाभाऱ्यास व परम-
पवित्रस्थानास दोन कवाडें होतीं. २४ एका कवाडास
दोन व दुसऱ्यास दोन अशा उघडझाक करितां येणाऱ्या
दोन दोन झडपा होत्या. २५ भिंतीवरल्याप्रमाणें त्यांवर
म्हणजे गाभाऱ्याच्या कवाडांवर करूब व खजुरीचीं
झाडें कोरिलीं होतीं, आणि बाहेरील देवडीच्या
बाहेरच्या बाजूस लाकडाच्या मोठ्यामोठ्या तुळ्या होत्या.
२६ देवडीच्या दोन्हीं बाजूंस झरोके असून त्यांवर
खजुरीचीं झाडेंहि कोरिलीं होतीं; मंदिराच्या बाजूच्या
खोल्या व मोठमोठ्या तुळ्या अशा तऱ्हेच्या होत्या.

४२ १ तेव्हां त्यानें मला उत्तरेकडच्या रस्त्यानें
बाहेरच्या अंगणांत नेलें; आणि ती सोडलेली
जागा व उत्तरेकडील इमारत यांसमोरील खोल्या
असलेल्या इमारतींत नेलें. २ तिचा दरवाजा उत्तरा-
भिमुख असून तिची लांबी शंभर हात व रुंदी पन्नास हात
होती. ३ आंतील वीस हाताच्या अंगणासमोर व बाहेरील
अंगणाच्या फरसबंदीसमोर तिसऱ्या मजल्यावर समोरा-
समोर सज्जे होते. ४ खोल्यांसमोर दहा हात
रुंद व शंभर[1] हात लांब अशी एक वाट होती; त्यांचे
दरवाजे उत्तराभिमुख होते. ५ वरच्या मजल्याची
जागा सज्जांत गुंतली होती म्हणून तेथल्या
खोल्या खालच्या व मधल्या मजल्यांवरील खोल्यांच्या
मानानें लहान होत्या. ६ कारण त्या खोल्यांचे तीन
मजले होते; अंगणांतल्याप्रमाणें त्यांस खांब नव्हते;
म्हणून खालच्या व मधल्या मजल्यांच्या जागेपेक्षां
वरली जा.. संकुचित होती; ७ आणि त्या खोल्यांशीं
समांतर अशी खोल्यांसमोरील बाहेरच्या अंगणाकडे
गेलेली एक भिंत होती; तिची लांबी पन्नास हात होती.
८ कारण बाहेरील अंगणाच्या खोल्यांची एकंदर लांबी
पन्नास हात होती; आणि पाहा, गाभाऱ्यापुढें ती शंभर
हात होती. ९ या खोल्यांच्या खालीं पूर्वेस प्रवेशद्वार
होतें, त्यांतून बाहेरच्या अंगणांतून येणारे त्या खोल्यांत
जात असत. १० दक्षिणेकडील[2] अंगणाच्या लांबीकडील
भिंतीला लागून त्या सोडलेल्या जागेसमोर व इमारती-
समोर खोल्या होत्या. ११ उत्तरेकडील खोल्यांसमोर
जसा रस्ता होता तसा त्यांच्या समोरहि रस्ता होता;
त्यांची लांबीरुंदी, त्यांच्या बाहेर जाण्याच्या सर्व
वाटा व त्यांची एकंदर व्यवस्था त्यांच्याप्रमाणेंच होती.
१२ त्यांच्या दरवाजांप्रमाणें दक्षिणाभिमुख असलेल्या
खोल्यांचे दरवाजे होते; रहदारीच्या रस्त्याच्या तोंडाजवळ
म्हणजे उजव्या भिंतीजवळील वाटेवर एक द्वार होतें;
त्यांतून पूर्वेकडून येणारे लोक प्रवेश करीत.

१३ तो मला म्हणाला, सोडलेल्या जागेसमोरील
उत्तरेकडल्या खोल्या व दक्षिणेकडल्या खोल्या पवित्र
असून त्यांत परमेश्वरासमोर जाणारे याजक यांनीं परम-
पवित्र पदार्थांचें सेवन करावें; तेथें त्यांनीं अन्नबलि,
पापबलि, दोषबलि वगैरे परमपवित्र पदार्थ ठेवावे;
कारण तें स्थान पवित्र आहे. १४ याजक आंत
गेल्यावर पवित्रस्थानांतून बाहेरच्या अंगणांत त्यांनीं
तसेंच जाऊं नये; तर सेवेच्या वेळचीं आपलीं वस्त्रें त्यांनीं
त्या खोल्यांत ठेवावीं, कारण तीं पवित्र आहेत; मग त्यांनीं

१ पाठभेद: एक
२ पाठभेद: पूर्वेकडील

दुसरीं वस्त्रें घालून सार्वजनिक स्थानीं जावें.
१५ त्यानें मंदिराचें आंतलें माप घेण्याचें संपविलें
तेव्हां त्यानें पूर्वाभिमुख असलेल्या द्वारानें मला
बाहेर नेलें व तें बाहेरून चोहों बाजूंनीं मापिलें.
१६ त्यानें मापावयाच्या काठीनें पूर्वभाग एकंदर
पांचशें हात मापिला. १७ त्यानें मापावयाच्या
काठीनें उत्तरभाग एकंदर पांचशें हात मापिला.
१८ तसाच मापावयाच्या काठीनें दक्षिणभाग एकंदर
पांचशें हात मापिला. १९ त्यानें पश्चिमेकडे वळून
मापावयाच्या काठीनें तो भाग एकंदर पांचशें हात
मापिला. २० त्यानें तें चारी बाजूंनीं मापिलें; पवित्र
स्थळें व सामान्य स्थळें एकमेकांहून वेगळीं ठेवण्या-
साठीं त्याला सभोवार एक भिंत होती; तिची लांबी
पांचशें हात व रुंदी पांचशें हात होती.

४३ १ मग पूर्वाभिमुख असलेल्या द्वाराकडे त्यानें
मला नेलें; २ तों पाहा, इस्राएलाच्या देवाचें
वैभव पूर्वेकडून प्रगट झालें; त्याचा शब्द महा-
पुराच्या ध्वनीसारखा होता; व त्याच्या वैभवानें पृथ्वी
प्रकाशित झाली. ३ मी नगराचा नाश करण्यास आलों
होतों तेव्हांच्या दृष्टांतासारखा दृष्टांत मीं पाहिला;
खबार नदीतीरीं जो दृष्टांत मीं पाहिला तसे दृष्टांत
माझ्या दृष्टीस पडले; तेव्हां मी उपडा पडलों.
४ पूर्वाभिमुख असलेल्या द्वारावाटे परमेश्वराचें तेज
मंदिरांत आलें. ५ तेव्हां आत्म्यानें मला उचलून
आंतील अंगणांत नेलें, तों पाहा, परमेश्वराच्या तेजानें
मंदिर भरून गेलें होतें; ६ आणि मंदिरांतून कोणी
मजबरोबर बोलत आहे असें मीं ऐकलें, आणि माझ्या-
जवळ एक पुरुष उभा होता. ७ तो मला म्हणाला,
मानवपुत्रा, हें माझ्या सिंहासनाचें स्थळ, माझ्या पादा-
सनाचें स्थळ आहे; तेथें मी इस्राएल वंशजांमध्यें सर्व-
काळ राहीन; इस्राएल घराण्याचे लोक व त्यांचे राजे
आपल्या व्यभिचारानें व त्यांच्या राजांनीं स्थापिलेल्या
प्रेतवत् मूर्तींनीं आपल्या उच्चस्थानांवर इतःपर माझ्या
पवित्र नामाला बट्टा लावणार नाहींत; ८ त्यांनीं आपला
उंबरठा माझ्या उंबरठ्यांशेजारीं, आपले द्वारस्तंभ माझ्या
द्वारस्तंभांशेजारीं उभारिले, आणि माझ्या व त्यांच्यामध्यें
केवळ एक भिंत होती; अमंगळ कृत्यें करून त्यांनीं
माझ्या पवित्र नामास बट्टा लाविला म्हणून मीं रागानें
त्यांचा नाश केला. ९ आतां त्यांनीं आपला व्यभिचार
व त्यांच्या राजांनीं स्थापिलेल्या प्रेतवत् मूर्ति मजपासून
दूर घालवाव्या, मग मी त्यांच्यामध्यें सर्वकाळ राहीन.
१० हे मानवपुत्रा, इस्राएल घराण्यास हें मंदिर
दाखीव, म्हणजे ते आपल्या पातकांबद्दल लज्जित
होतील व त्यांनीं ह्या नमुनेदार इमारतीचें माप घ्यावें.
११ त्यांनीं केलेल्या सर्व कृत्यांबद्दल ते लज्जित झाले म्हणजे
त्यांस या मंदिराचा आकार, त्याची रचना, त्यांत
येण्याजाण्याचे मार्ग, त्यांतील सर्व आकृति, त्याचे सर्व
विधि, व त्याचे सर्व नियम त्यांस दाखीव व त्यांच्या-
समोर लिहून ठेव, म्हणजे त्यांच्या सर्व नियमांचें व
विधींचें अवलंबन करून त्याप्रमाणें ते वागतील.
१२ मंदिराचा हा नियम आहे; पर्वताच्या माथ्यावरील
भोवतालचा सर्व प्रदेश अत्यंत पवित्र आहे. पाहा,
मंदिराचा हा नियम आहे.
१३ हातांनीं वेदीचीं मापें हीं आहेत; (हा हात
म्हणजे एक हात व चार अंगुळें;) तिचा तळभाग
हातभर उंच, हातभर रुंद आणि तिचा कडेचा पाटथरा
वीतभर; हा वेदीचा पाया. १४ तिच्या तळभागापासून
खालच्या बैठकीपर्यंत उंची दोन हात व रुंदी एक हात
आणि खालच्या बैठकीपासून वरच्या बैठकीपर्यंत उंची
चार हात व रुंदी एक हात. १५ वेदीच्या वरच्या
भागाची उंची चार हात; वेदीच्या अग्निकुंडाला लागून
वर गेलेलीं चार शृंगें होतीं. १६ वेदीचें अग्निकुंड
बारा हात लांब व बारा हात रुंद होतें; तें समचौरस
होतें. १७ तिची बैठक चौदा हात लांब व चौदा हात
रुंद अशी चौरस होती; व तिच्यासभोवतालचा
पाटथरा अर्धा हात, आणि तिचा तळभाग सभोवार
एक हात उंच होता; तिच्या पायऱ्या पूर्वाभिमुख होत्या.

१ **पाठभेद** : काठ्या; हाच पाठभेद या अध्यायांत इतर स्थळींहि समजावा.

२ **अथवा** : राजांच्या मढ्यांकडून इतःपर माझ्या

१८ तेव्हां तो मला म्हणाला, मानवपुत्रा, प्रभु
परमेश्वर म्हणतो, या वेदीवर होमार्पण करावें व रक्त
शिंपडावें म्हणून ती बांधून काढितील त्यानंतरच्या
दिवसांचे तिजसंबंधाचे विधि हे: १९ माझी सेवा करा-
वयास मजसमीप येणाऱ्या लेवी वंशांतला सादोकाच्या
कुळांतील याजक यांस पापार्पण करण्यासाठीं तूं एक
गोऱ्हा दे, असें प्रभु परमेश्वर म्हणतो. २० तूं त्याचें रक्त
घेऊन वेदीच्या चारी शृंगांवर, बैठकीच्या चारी कोपऱ्यां-
वर व भोवतालच्या पाटथऱ्यावर शिंपड; अशा
प्रकारें प्रायश्चित्त करून ती शुद्ध कर. २१ नंतर
तूं पापार्पणाचा बैल घे व त्यानें पवित्रस्थानाच्या
बाहेर मंदिराच्या नेमिलेल्या जागीं त्याचा होम
करावा. २२ दुसऱ्या दिवशीं पापार्पण करण्यासाठीं
एक निर्दोष बोकड घे; बैलाच्या होमानें
जशी वेदी शुद्ध केली तशी यानेंहि केली पाहिजे.
२३ शुद्धीकरण संपलें म्हणजे एक निर्दोष गोऱ्हा व
कळपांतला एक निर्दोष एडका अर्पण कर. २४ तूं ते
परमेश्वरासमोर आण; मग याजक त्यांवर मीठ टाकि-
तील व त्यांचें हवन करून ते परमेश्वरास अर्पण करि-
तील. २५ तूं सात दिवस रोज एकेका निर्दोष
बकऱ्याचें पापार्पण कर; एक गोऱ्हा व कळपांतील एक
निर्दोष एडका हेहि त्यांनीं अर्पण करावे. २६ याप्रमाणें
सात दिवस वेदीबद्दल प्रायश्चित्त करून तिची शुद्धि करावी;
असा तिचा संस्कार व्हावा. २७ या दिवसांच्या कार्याची
समाप्ति झाल्यावर आठव्या दिवशीं व त्यापुढें याजक
तुमचे होमबलि व तुमचे शांतिबलि वेदीवर अर्पितील
आणि मी तुम्हांवर प्रसन्न होईन असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

४४ १ मग त्यानें मला त्या मंदिराच्या पूर्वाभि-
मुख असलेल्या बाहेरल्या द्वारास जाणाऱ्या
वाटेनें परत आणिलें, तों तें द्वार बंद होतें.
२ तेव्हां परमेश्वर मला म्हणाला, हें द्वार बंद ठेवावें,
उघडूं नये, यानें कोणीं प्रवेश करूं नये; कारण परमे-
श्वर, इस्राएलाचा देव, यानें या द्वारानें प्रवेश केला
म्हणून हें बंद ठेवावें. ३ राजाविषयीं म्हणाल तर तो
राजा आहे म्हणून परमेश्वराच्यासमोर त्या द्वारांत
बसून तो भोजन करील; द्वारांच्या देवडीच्या वाटेनें
तो येईलजाईल.

४ नंतर त्यानें मला उत्तर द्वारास जाणाऱ्या वाटेनें
मंदिरासमोर नेलें; मीं पाहिलें तों परमेश्वराच्या तेजानें
परमेश्वराचें मंदिर भरलें होतें; तेव्हां मी उपडा पडलों.
५ मग परमेश्वर मला म्हणाला, मानवपुत्रा, परमेश्वराच्या
मंदिराविषयींचे सर्व विधि व सर्व नियम यांविषयीं जे सर्व
मी तुला सांगतों त्याकडे चित्त दे; डोळे उघडून पाहा
व कान देऊन ऐक; आणि मंदिराच्या प्रत्येक द्वारानें
पवित्रस्थानांत जाण्यासंबंधानें जें सांगतों त्याकडे चित्त
दे. ६ त्या फितुरी इस्राएल घराण्यास सांग, प्रभु परमेश्वर
म्हणतो, इस्राएल वंशजहो, तुम्हीं हीं सगळीं अमंगळ
कृत्यें केलीं तेवढें पुरे; ७ तुम्हीं मला अन्न, वपा व
रक्त अर्पितांना मनानें व शरीरानेंहि बेसुंती अशा परक्या
लोकांस माझ्या पवित्रस्थानांत आणून माझें मंदिर भ्रष्ट
केलें आहे; ह्याप्रमाणें तुम्हीं माझा करार मोडून
आपल्या सर्व अमंगळ कृत्यांत भर घातली आहे. ८ तुम्हीं
माझ्या पवित्र वस्तूंची राखण केली नाहीं, तर तुम्हीं
माझ्या पवित्रस्थानांत आपल्याऐवजीं त्यांस माझ्या पवित्र
वस्तूंचे राखणदार नेमिलें.

९ प्रभु परमेश्वर म्हणतो, इस्राएल वंशजांमध्यें
राहणाऱ्या, मनानें व शरीरानें बेसुंती असलेल्या
परदेशीयांपैकीं कोणीं माझ्या पवित्रस्थानांत प्रवेश करितां
कामा नये. १० इस्राएल बहकून गेले तेव्हां जे लेवी
मजपासून दूर गेले व आपल्या मूर्तींच्या मागें लागून
मला सोडून बहकले त्यांस आपल्या अधर्माचें प्रतिफळ
भोगावें लागेल. ११ ते माझ्या पवित्रस्थानांतले चाकर
होतील; मंदिराच्या द्वारांपुढें ते पहारेकरी होतील
व माझ्या मंदिरांत ते सेवाचाकरी करितील; ते
लोकांसाठीं होमपशु व यज्ञबलि यांचा वध
करितील; व लोकांची सेवाचाकरी करण्यास त्यांजपुढें
उभे राहतील. १२ त्यांनीं त्याच्या मूर्तींपुढें इस्राएल-
घराण्याची सेवाचाकरी केली व ते त्यांस पापांत पाड-
णारे अडथळे झाले, म्हणून मीं त्यांवर आपला हात
उगारिला आहे, आणि ते आपल्या अधर्माचें प्रतिफळ
भोगितील असें प्रभु परमेश्वर म्हणतो. १३ त्यांनीं याजक
या नात्यानें माझी सेवा करण्यासाठीं मजसमक्ष येतां

कामा नये; माझ्या सर्व पवित्र वस्तु, परमपवित्र वस्तु यांजवळ त्यांनीं येतां कामा नये; तर त्यांनीं आपली अप्रतिष्ठा सोसावी व आपल्या अमंगळ कर्मांबद्दल शिक्षा भोगावी. १४ माझ्या मंदिरांत जी कांहीं सेवा होत असते तिला अनुसरून व त्यांत जें कांहीं करावयाचें असतें त्यासंबंधानें माझ्या मंदिराची राखण करणारे असें मी त्यांस करीन.

१५ इस्राएल वंशज मला सोडून बहकून गेले तेव्हां लेवी वंशांतील याजकांपैकीं सादोक वंशज यांनीं माझ्या पवित्रस्थानाची सेवाचाकरी केली, म्हणून ते मजसमीप येऊन माझी सेवा करितील, मजसमोर उभे राहतील आणि मला वपा व रक्त अर्पितील, असें प्रभु परमेश्वर म्हणतो; १६ ते माझ्या पवित्रस्थानांत येतील, ते माझी सेवा करण्यासाठीं माझ्या मेजाजवळ येतील आणि माझ्या पवित्र वस्तूंचें रक्षण करितील. १७ ते आंतल्या अंगणाच्या द्वारांकडे जातील तेव्हां त्यांनीं तागाचीं वस्त्रें परिधान करावीं; ते आंतल्या अंगणांतील द्वारांत व मंदिरांत सेवा करितील तेव्हां त्यांनीं लोकरीचीं वस्त्रें घालूं नयेत. १८ त्यांनीं आपल्या डोक्यांस तागाचीं पागोटीं घालावीं; त्यांनीं कमरेस तागाचे चोळणे घालावे; त्यांनीं घाम येण्यासारिखें कमरेस कांहीं वेष्टूं नये. १९ ते बाहेरील अंगणांत जातील, लोकांमध्यें बाहेरील अंगणांत जातील, तेव्हां त्यांच्या वस्त्रांच्या स्पर्शानें लोक पवित्र होऊं नयेत म्हणून त्यांनीं सेवेच्या वेळचीं वस्त्रें काढून पवित्र खोल्यांत ठेवावीं व दुसरीं वस्त्रें ल्यावीं. २० त्यांनीं आपलीं डोकीं मुंडवूं नयेत, किंवा केस लांब वाढूं देऊं नयेत, तर त्यांनीं आपल्या डोक्याचे केस कापावे. २१ आंतल्या अंगणांत जावयाच्या वेळीं कोणाहि याजकानें द्राक्षारस पिऊं नये. २२ त्यांनीं विधवेबरोबर किंवा सोडलेल्या स्त्रीबरोबर विवाह करूं नये, तर इस्राएली वंशांतील कुमारीबरोबर अथवा कोणा याजकाची विधवा असल्यास तिजबरोबर विवाह करावा. २३ त्यांनीं माझ्या लोकांस शिक्षण द्यावें; पवित्र काय व सामान्य काय, शुद्ध काय व अशुद्ध काय, यांचा भेद त्यांस त्यांनीं दाखवून द्यावा. २४ तंट्याबखेड्यांचा निवाडा करण्यास त्यांनीं तत्पर असावें; माझ्या निर्णयांप्रमाणें हा निवाडा त्यांनीं करावा; सर्व सणांत माझें धर्मशास्त्र व नियम पाळावे आणि माझ्या शब्बाथांचें पवित्रपणें पालन करावें. २५ त्यांनीं प्रेतास शिवून अशुचि होऊं नये; मात्र आई, बाप, मुलगा, मुलगी, भाऊ व अविवाहित बहीण यांच्या बाबतींत ते अशुचि झाले असतां चालेल. २६ तो शुद्ध झाल्यावर आणखी सात दिवस मोजावे. २७ मग तो पवित्रस्थानांत, म्हणजे अर्थात आंतल्या अंगणांत, पवित्रस्थानांतील सेवा करावयास जाईल त्या दिवशीं त्यानें आपलें पापार्पण करावें, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

२८ त्यांना वतन काय म्हणाल तर मी त्यांचें वतन आहें; त्यांस इस्राएलांत वांटा देऊं नये; त्यांचा वांटा मी आहें. २९ अन्नार्पण, पापार्पण व दोषार्पण हीं त्यांनीं खावीं; इस्राएलांनीं वाहिलेली हरएक वस्तु त्यांची व्हावी. ३० सर्व प्रथम फळांचा प्रथम भाग, समर्पित अंश म्हणून अर्पण करावयाची प्रत्येक वस्तु याजकांची व्हावी; तुम्ही तिंबलेल्या कणिकेचा पहिला गोळा याजकांस द्यावा म्हणजे तुमच्या घराला बरकत येईल. ३१ कोणताहि आपोआप मेलेला किंवा फाडून टाकिलेला प्राणी याजकांनीं खाऊं नये; मग तो पक्षी असो किंवा पशु असो.

४५ १ तुम्ही चिठ्या टाकून वतनासाठीं देशाची वांटणी कराल तेव्हां परमेश्वराप्रीत्यर्थ समर्पित अंश अर्पावा; जमिनीचा एक वांटा पवित्र म्हणून वेगळा काढून ठेवावा; त्याची लांबी पंचवीस हजार हात व रुंदी वीस हजार हात असावी; हें सारें क्षेत्र चोहोंकडून पवित्र ठेवावें. २ यापैकीं पांचशें हात लांब व पांचशें हात रुंद एवढी समचौरस जागा पवित्रस्थानासाठीं ठेवून तिच्याभोवतीं पन्नास हात खुली जागा राखून ठेवावी, ती सभोवतीं समचौरस असावी. ३ त्या मापिलेल्या जमिनींतून तूं पंचवीस हजार हात लांब व दहा हजार हात रुंद मापून काढ; या क्षेत्रांत पवित्रस्थान होणार; तें परमपवित्र होय. ४ हें क्षेत्र पवित्र राहावें; सेवा करावयास परमेश्वरासमीप जाणाऱ्या पवित्र-

१ पाठभेद: काठ्या, व रुंदी दहा हजार काठ्या

स्थानाच्या सेवकांसाठीं म्हणजे याजकांसाठीं तें असावें;
त्यांत त्यांच्या घरांसाठीं जागा व पवित्रस्थानासाठीं
पवित्र जागा असावी. ५ पंचवीस हजार हात लांब व
दहा हजार हात रुंद एवढी जागा मंदिराची सेवाचाकरी
करणाऱ्या लेव्यांची व्हावी; वसतिस्थानासाठीं हें त्यांचें
वतन होय. ६ समर्पित अंश म्हणून जी जागा निराळी
ठेवावयाची तिला लागून पांच हजार हात रुंद व
पंचवीस हजार हात लांब एवढी जमीन नगरासाठीं
वतन म्हणून द्यावी; ही सगळ्या इस्राएली घराण्याची व्हावी.
७ समर्पित अंश म्हणून ठेवलेला भाग व नगरास
दिलेला भाग यांस लागून दोहों बाजूंकडील म्हणजे
पश्चिमेकडील व पूर्वेकडील जागा अधिपतीस द्यावी;
पश्चिम सीमेपासून पूर्व सीमेपर्यंत तिची लांबी
इस्राएली वंशांस वांटून दिलेल्या भागाच्या लांबीइतकी
असावी. ८ ही जमीन इस्राएलांत अधिपतीचें वतन
व्हावी, म्हणजे यापुढें माझ्या अधिपतींनीं माझ्या
लोकांवर जुलूम करूं नये; तर इस्राएली घराण्यांतील
निरनिराळ्या वंशांस दिलेली जमीन ज्याची त्याजकडे
राहूं द्यावी.

९ प्रभु परमेश्वर म्हणतो, इस्राएलाच्या अधिपतींनो,
झालें तें पुरें; आतां तुम्ही बलात्कार व जुलूम यांपासून
दूर राहा, न्याय व नीति यांचें पालन करा, आणि
माझ्या लोकांस त्यांच्या वतनांतून घालवून देण्याचें
सोडा, असें प्रभु परमेश्वर म्हणतो. १० खरी तागडी,
खरी एफा व खरी बथ वापरा. ११ एफा व बथ ह्या
दोन्ही एकाच परिमाणाच्या असाव्या; बथ होमराचा
दहावा भाग; तसाच एफाहि होमराचा दहावा भाग;
ह्या होमराच्या प्रमाणानें असाव्या. १२ शेकेल वीस
गेरांचा असावा, आणि माने वीस शेकेलांचा, पंचवीस
शेकेलांचा किंवा पंधरा शेकेलांचा असावा.

१३ समर्पित अंश म्हणून अर्पावयाचीं तुमचीं अर्पणें
येणेंप्रमाणें असावीं: गव्हांच्या एका होमरामागें एक
षष्ठांश एफा गहूं, आणि जवांच्या एका होमरामागें एक
षष्ठांश एफा जव द्यावे; १४ तेलाचा नियमित अंश
द्यावयाचा तो दहा बथांचा खोर[1] म्हणजे एक होमर
यामागें एकदशांश बथ असावा; दहा बथांचा एक होमर
होतो. १५ इस्राएल देशांतील पाणथळाच्या कुरणांतील
कळपांतून दोनशें मेंढरांमागें एक कोकरूं द्यावें; लोकां-
प्रीत्यर्थ प्रायश्चित्त करावें म्हणून अन्नार्पण, होमार्पण व
शांत्यर्पणें हीं द्यावीं, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.
१६ इस्राएलाच्या अधिपतीस देशाच्या सर्व लोकांनीं हीं
समर्पित अंशाचीं अर्पणें पुरविलीं पाहिजेत. १७ उत्सव,
चंद्रदर्शनें, शब्बाथ व इस्राएल घराण्याचे सर्व सण यांत
होमार्पण, अन्नार्पण व पेयार्पण यांची तरतूद करणें हें
अधिपतीचें काम आहे; इस्राएल घराण्यासाठीं प्रायश्चित्त
करावयासाठीं त्यानें पापार्पण, अन्नार्पण, होमार्पण व
शांत्यर्पणें हीं सिद्ध करावीं.

१८ प्रभु परमेश्वर म्हणतो, पहिल्या महिन्याच्या
प्रतिपदेस एक निर्दोष गोऱ्हा घेऊन पवित्रस्थान शुद्ध
करावें. १९ तेव्हां याजकानें पापार्पणाच्या पशूचें रक्त
घेऊन तें मंदिराच्या दरवाजाच्या बाह्यांवर, वेदीच्या
बैठकीच्या चारी कोपऱ्यांवर व आंतील अंगणाच्या दर-
वाजाच्या बाह्यांवर शिंपडावें. २० तसेंच त्या महिन्याच्या
सप्तमीस भ्रांतींत पडलेल्या किंवा मूढ झालेल्या
प्रत्येक माणसाप्रीत्यर्थ असेंच करावें; या प्रकारें तुम्हीं
मंदिरासाठीं प्रायश्चित्त करावें.

२१ पहिल्या महिन्याच्या चतुर्दशीस तुम्हीं वल्हांडण,
म्हणजे पुऱ्या सप्तकाचा सण पाळावा; ह्या सणांत बेखमीर
भाकर खावी. २२ त्या दिवशीं स्वतांसाठीं व देशाच्या
सर्व लोकांसाठीं पापार्पण करावें म्हणून अधिपतीनें एक
गोऱ्हा सिद्ध करावा. २३ परमेश्वरास होमार्पण करण्या-
साठीं सणाचे सात दिवस त्यानें सात निर्दोष गोऱ्हे व
सात मेंढे सिद्ध करावे आणि पापार्पणासाठीं रोज एक बोकड
सिद्ध करावा; २४ आणि अन्नार्पण म्हणून दर गोऱ्ह्यामागें
व दर मेंढ्यामागें एफाभर अन्न व दर एफाबरोबर एक
हीनभर तेल अर्पावें. २५ सातव्या महिन्याच्या पौर्णिमे-
पासून सणाचे सात दिवस पापबलि, होमबलि, अन्न-
बलि आणि तेल हीं याप्रमाणेंच अर्पावीं.

१ पाठभेद: काळ्या. २ एक माप. ३ एक वजन.

४६ १ प्रभु परमेश्वर म्हणतो, आंतील अंगणाचें
पूर्वाभिमुख असलेलें द्वार कामाचे सहा दिवस
बंद असावें; शब्बाथ दिवशीं तें उघडें ठेवावें, तसेंच
चंद्रदर्शनाच्या दिवशींहि तें उघडें ठेवावें. २ अधिपतीनें
बाहेरून दरवाजाच्या देवडीकडे जाणाऱ्या मार्गानें यावें,
त्यानें दरवाजाच्या बाह्यांनजीक उभें राहावें; याजकांनी
त्याजकडले होमार्पण व शांत्यर्पणें करावीं; मग
त्यानें दरवाजाच्या उंबरठ्यावरून परमेश्वराला दंडवत
घालून बाहेर जावें; हा दरवाजा संध्याकाळपर्यंत बंद
करूं नये. ३ देशाच्या लोकांनीं शब्बाथ दिवशीं व
चंद्रदर्शनीं त्या दरवाजावरूनच परमेश्वराला दंडवत
घालावें. ४ अधिपतीनें शब्बाथ दिवशीं परमेश्वराला
होमार्पण करावयाचें तें सहा निर्दोष कोंकरें व एक
निर्दोष एडका यांचें असावें; ५ दर एडक्यामागें एक एफा
अन्नार्पण करावें व दर कोकरामागें यथाशक्ति अन्नार्पण
करावें आणि प्रत्येक एफाबरोबर एक हीनभर तेल अर्पावें.
६ चंद्रदर्शनाच्या दिवशीं एक निर्दोष गोऱ्हा,
सहा निर्दोष कोकरें व एक निर्दोष एडका हीं अर्पण
करावीं; ७ दर गोऱ्ह्यामागें एक एफा व दर एडक्या-
मागें एक एफा अन्नार्पण सिद्ध करावें; दर
कोकरामागें यथाशक्ति अन्नार्पण करावें, आणि प्रत्येक
एफाबरोबर एक हीनभर तेल अर्पावें. ८ अधिपतीनें
आंत प्रवेश करितांना दरवाजाच्या देवडीकडील मार्गानें
यावें व त्याच मार्गानें बाहेर जावें.

९ सणांच्या दिवशीं देशाचे लोक परमेश्वरा-
समीप येतील तेव्हां त्यांपैकीं जो नमन करण्यास
उत्तरद्वारानें आंत येईल त्यानें दक्षिणद्वारानें बाहेर
जावें व दक्षिणद्वारानें येईल त्यानें उत्तरद्वारानें बाहेर
जावें; ज्या द्वारानें तो येईल त्याच द्वारानें त्यानें
परत जाऊं नये, तर नीट पुढें जावें. १० ते
प्रवेश करीत असतां अधिपतीनें त्यांच्यांत मिसळून
आंत यावें; ते बाहेर जातांनाहि त्यानें त्यांच्याबरोबर
जावें. ११ उत्सवांच्या व सणांच्या दिवशीं दर गोऱ्ह्या-
मागें एक एफा अन्नार्पण व दर एडक्यामागें एक एफा
अन्नार्पण करावें; दर कोकरामागें यथाशक्ति अन्नार्पण
करावें, आणि दर एफाबरोबर एक हीनभर तेल अर्पावें.
१२ अधिपति परमेश्वराला स्वसंतोषाचें अर्पण म्हणून
होमबलि किंवा शांत्यर्पणें करील तेव्हां त्याच्यासाठीं पूर्वा-
भिमुख असलेलें द्वार उघडावें, आणि शब्बाथ दिवसाच्या-
प्रमाणें त्यानें होमार्पण व शांत्यर्पणें करावीं; तो बाहेर
निघून गेल्यावर द्वार कोणी तरी बंद करावें.

१३ परमेश्वराला रोज होमार्पण करण्यासाठीं एक
वर्षाचें निर्दोष असें कोकरूं सिद्ध करावें; दररोज सकाळीं
तें सिद्ध करावें. १४ दररोज सकाळीं त्याबरोबर अन्ना-
र्पण सिद्ध करावें; गव्हाचें पीठ एक षष्ठांश एफा, व तें
नरम करण्यासाठीं एक तृतीयांश हीन तेल, असें अन्ना-
र्पण परमेश्वराला करावें; हा सर्वकालचा विधि सतत चालव-
वयाचा आहे. १५ या प्रकारें रोज सकाळीं कोकरूं, अन्ना-
र्पण व तेल असें नित्यक्रमानें होमार्पण सिद्ध करावें.

१६ प्रभु परमेश्वर म्हणतो, अधिपति आपल्या पुत्रां-
पैकीं कोणाला कांहीं इनाम देईल तर तें त्याच्या
वतनांतलें असल्यामुळें त्याच्या पुत्रांचें होईल;
तें त्यांचें वंशपरंपरेचें वतन होईल; १७ पण
तो आपल्या वतनाचा कांहीं भाग आपल्या
एकाद्या चाकरास इनाम देईल तर मुक्ततेच्या वर्षापर्यंत
तो त्याजकडे राहील; मग तो अधिपतीकडे परत
जाईल; त्याचें वतन त्याच्या पुत्रांसच मिळेल.
१८ आणखी अधिपतीनें लोकांचें कोणतेंहि वतन घेऊन
त्यांस घालवून देऊं नये; त्यानें आपल्या खासगी वतनाचा
भाग आपल्या पुत्रांस द्यावा; म्हणजे माझ्या लोकांपैकीं
कोणीहि वतनास मुकून परागंदा होणार नाहीं.

१९ मग द्वाराजवळ असलेल्या वाटेनें याजकांच्या
उत्तराभिमुख पवित्र खोल्यांत त्यानें मला नेलें; तों तेथें
पश्चिमेस अगदीं बाहेरल्या बाजूस एक स्थान आढळलें.
२० तो मला म्हणाला, याजक दोषार्पणाचें व पापा-
र्पणाचें मांस शिजवितात तें हें स्थळ; अन्नार्पणाहि येथेंच
भाजतात; त्यांनीं तीं बाहेरच्या अंगणांत नेऊं नयेत,
म्हणजे त्यांच्या स्पर्शानें लोक पवित्र होणार नाहींत.
२१ नंतर त्यानें मला बाहेरच्या अंगणांत नेलें, व त्याच्या
चारी कोपऱ्यांतून मला फिरविलें तों त्या अंगणाच्या

प्रत्येक कोपऱ्यांत आणखी एकएक अंगण दृष्टीस पडलें.
२२ अंगणाच्या चारी कोपऱ्यांस चाळीस हात लांबीचीं
व तीस हात रुंदीचीं आवारें होतीं; तीं एका मापाचीं
होतीं. २३ त्या चाऱ्हींमध्यें चोहोंकडे चुलाणांच्या रांगा
होत्या, आणि त्या रांगांखालीं सभोवार स्वयंपाकाच्या
चुली होत्या. २४ तो मला म्हणाला, ह्या पाकशाळा
आहेत, यांत मंदिराची सेवाचाकरी करणारे इसम
लोकांचे यज्ञपशु शिजवितात.

४७ १ मग त्यानें मला मंदिराच्या द्वाराकडे
परत नेलें, तों पाहा, मंदिराच्या उंबरठ्याखालून
पाण्याचा झरा निघून पूर्वेकडे वाहत होता;
मंदिराची पुढली बाजू पूर्वेस होती; तो झरा मंदिराच्या
उजव्या बाजूनें वेदीच्या दक्षिणेस खालून वाहत
होता. २ त्यानें मला उत्तरद्वाराच्या वाटेनें बाहेर
नेलें; व बाहेरच्या रस्त्यानें सभोवार फिरवून
बाहेरल्या द्वाराकडे म्हणजे पूर्वाभिमुख असलेल्या
द्वाराकडे नेलें, तों पाहा, द्वाराच्या उजव्या बाजूस पाणी
वाहत होतें. ३ मग तो पुरुष पूर्वदिशेस चालला व
त्याच्या हातीं मापनसूत्र होतें; त्यानें एक हजार हात
अंतर मापून मला पाण्यांतून चालावयास सांगितलें, तों
तेथें पाणी घोट्यांपर्यंत होतें. ४ त्यानें आणखी हजार
हात अंतर मापून मला पाण्यांतून चालावयास सांगितलें,
तों तेथें पाणी गुडघ्यांपर्यंत होतें. त्यानें आणखी
हजार हात अंतर मापून मला पाण्यांतून चालावयास
सांगितलें, तों तेथें पाणी कमरेपर्यंत होतें. ५ त्यानें
आणखी हजार हात अंतर मापिलें, तों त्या नदींतून
माझ्यानें चालवेना, कारण पाणी फार झालें; मला त्यांतून
पोहून जातां आलें असतें; उतरून जातां आलें नसतें,
एवढी ती नदी झाली.

६ तो मला म्हणाला, मानवपुत्रा, तूं हें पाहिलेंना ?
मग त्यानें मला नदीतीरानें माघारी नेलें. ७ परत
येत असतां नदीच्या दोन्ही तीरांवर बहुत झाडें
असलेलीं मीं पाहिलीं. ८ तो मला म्हणाला, हें पाणी
पूर्वप्रदेशाकडे वाहत जातें आणि तेथून अराबांत उतरून
समुद्राकडे जातें; ही नदी समुद्रास मिळून त्याचें पाणी
निर्दोष होतें. ९ ही महानदी जाईल तेथेंतेथें तींत
जे जीवजंतु भरलेले असतील ते जगतील व तींत
मासे विपुल होतील, कारण जेथेंजेथें हें पाणी जाईल
तेथेंतेथें सर्व कांहीं निरोगी होईल; जेथेंजेथें ही नदी
जाईल तेथेंतेथें सर्व प्राणी जीवंत राहतील. १० तिच्या
तीरीं धीवर उभे राहून एन-गेदीपासून एन-इग्लाइमापर्यंत
पाग टाकितील; महासागरांतल्या माशांप्रमाणें त्या नदींत
भिन्नभिन्न जातींचे विपुल मासे सांपडतील. ११ त्यांतील
पाणथळें व दलदली यांचें पाणी निर्दोष होणार नाहीं;
तीं खारटाणेंच राहतील. १२ नदीच्या उभय तीरांनीं
खाण्याजोगीं फळें देणारीं हरतऱ्हेचीं झाडें वाढतील;
त्यांचीं पानें वाळणार नाहींत; त्यांच्या फळांचा लाग
खुंटणार नाहीं; प्रतिमासीं तीं पक्व फळें देतील, कारण
त्या नदीचें पाणी पवित्रस्थानांतून निघालें आहे; त्या वृक्षांचीं
फळें खाण्याजोगीं व त्यांचीं पानें औषधी होतील.

१३ प्रभु परमेश्वर म्हणतो, तुम्ही हा देश इस्राएलाच्या
बारा वंशांस वतन म्हणून वांटून द्याल तेव्हां त्यांत योसे-
फाचे दोन वांटे धरून त्याच्या सीमा येणेंप्रमाणें
असाव्या : १४ ह्या देशाचे तुम्हांस सारखे वांटे मिळून
तुम्ही येथचें वतन पावाल, कारण हा देश तुमच्या
वडिलांस देईन अशी मीं हात वर करून शपथ केली
आहे; या प्रकारें हा देश तुमचें वतन होईल.
१५ देशाच्या सीमा येणेंप्रमाणें; उत्तरेस मोठ्या समुद्रा-
पासून हेथलोनाच्या वाटेनें सदादाच्या सरहद्दीपर्यंत;
१६ हमाथ, बेरोथा, दिमिष्काच्या व हमाथाच्या सरहद्दी-
वरलें सिब्राइम व हौरानाच्या सीमेवरलें मध्यहासेर.
१७ समुद्रापासून ही सीमा म्हणजे दिमिष्काच्या सर-
हद्दीवरील गांव हसर-एनोन एथवर, उत्तरेस हमाथ ही
सीमा. ही उत्तर बाजू झाली. १८ पूर्वेस हौरान व
दिमिष्क, गिलाद व इस्राएलदेश यांच्या दरम्यान अस-
लेली यार्देन नदी; सरहद्दीपासून पूर्वसमुद्रापर्यंत मोजणी
करा; ही पूर्व बाजू झाली. १९ दक्षिण सीमा ही : तामार-
पासून मरीबोथ कादेशच्या पाण्यापर्यंत, व तेथून मिसर-
देशच्या नाल्यानें थेट मोठ्या समुद्रापर्यंत; हीं दक्षिण
बाजू झाली. २० पश्चिम सीमा ही दक्षिण सीमेपासून
हमाथाच्या घाटापर्यंतचा मोठा समुद्र; ही पश्चिम बाजू
झाली.

२१ या प्रकारें तुम्ही हा देश आपसांत इस्रा-
एलाच्या वंशांप्रमाणें वांटून घ्या. २२ असें करा कीं
तुम्ही आपल्या वतनासाठीं आणि तुमच्यांत वस्ती
करणारे व तुमच्यांत राहून संतति झालेले परदेशस्थ
लोक यांच्या वतनासाठीं हा देश चिठ्या टाकून वांटून
द्या; हे परदेशस्थ लोक इस्राएल वंशजांमध्यें जन्मलेले
आहेत असें धरून चाला; त्यांस तुम्हांबरोबर इस्रा-
एलाच्या वंशांमध्यें वांटा मिळावा. २३ इस्राएलाच्या
ज्या विभागांत कोणी परदेशस्थ राहत असेल त्यांत
त्याला वतन द्यावें, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.

१ आतां वंशांचीं नांवें हीं: उत्तरेच्या
४८ सीमेपासून हेथलोनच्या रस्त्याकडील हमाथाच्या
घाटाचा रस्ता, दिमिष्काच्या सरहद्दीवरलें हसर-
एनान या पूर्वपश्चिम सीमा असलेला प्रदेश,
हमाथाला लागून असलेला जो उत्तरेकडील प्रदेश तो
दानाचा विभाग. २ दानाच्या सरहद्दीस लागून अस-
लेला जो पूर्वपश्चिम प्रदेश तो आशेराचा विभाग.
३ आशेराच्या सरहद्दीस लागून असलेला जो पूर्वपश्चिम
प्रदेश तो नफतालीचा विभाग. ४ नफतालीच्या सर-
हद्दीस लागून असलेला जो पूर्वपश्चिम प्रदेश तो
मनश्शाचा विभाग. ५ मनश्शाच्या सरहद्दीस लागून
असलेला जो पूर्वपश्चिम प्रदेश तो एफ्राइमाचा विभाग.
६ एफ्राइमाच्या सरहद्दीस लागून असलेला जो पूर्वपश्चिम
प्रदेश तो रऊबेनाचा विभाग. ७ रऊबेनाच्या सरहद्दीस
लागून असलेला जो पूर्वपश्चिम प्रदेश तो यहूदाचा विभाग.
८ यहूदाच्या सरहद्दीस लागून असलेला जो पूर्व-
पश्चिम प्रदेश पंचवीस हजार हात रुंद व इतर वंशांच्या
विभागांइतका पूर्वपश्चिम लांब तो समर्पित अंश म्हणून
अर्पाल त्यामध्यें पवित्रस्थान असणार. ९ परमेश्वराला
जो समर्पित अंश म्हणून अर्पाल तो पंचवीस हजार
हात लांब व दहा हजार हात रुंद असावा. १० हा
समर्पित अंश याजकांचा; हा उत्तरेस पंचवीस हजार
हात, पश्चिमेस दहा हजार हात रुंद, पूर्वेस दहा हजार
हात रुंद व दक्षिणेस पंचवीस हजार हात लांब
असावा; परमेश्वराचें पवित्र स्थान ह्यामध्यें असणार.
११ याजकांपैकीं जे सादोक वंशज पवित्र केले आहेत,
त्यांनीं माझे नियम पाळिले आहेत, व जे लेव्यांप्रमाणें
इस्राएल वंशजांबरोबर बहकले नाहींत, १२ त्यांत देशां-
तील समर्पित अंशांतला एक अंश, म्हणजे अर्थात्
लेव्यांच्या विभागांतला एक परमपवित्र विभाग द्यावा;
१३ आणि याजकांच्या विभागास लागून पंचवीस
हजार हात लांब व दहा हजार हात रुंद असा विभाग
लेव्यांस मिळावा; त्याची सबंध लांबी पंचवीस हजार
हात व रुंदी दहा हजार हात असावी. १४ त्यांनीं
त्यांतला कांहीं विकूं नये व त्याचा अदलाबदल करूं
नये; तसेंच देशांतील प्रथम फळें इतरांकडे जाऊं देऊं
नयेत; कारण तो भाग परमेश्वराला पवित्र आहे.
१५ त्या पंचवीस हजार हात लांबीच्या प्रदेशापैकीं जो
पांच हजार हात रुंदीचा भाग राहील तो नगरासाठीं
सार्वजनिक असून तो वस्तीसाठीं व बखळीसाठीं
सोडावा; त्याच्यामध्यें नगर वसवावें. १६ त्याचें माप असें
असावें: उत्तर बाजू साडेचार हजार हात, दक्षिण बाजू
साडेचार हजार हात, पूर्व बाजू साडेचार हजार हात व
पश्चिम बाजू साडेचार हजार हात. १७ नगराची बखळ
उत्तरेस अडीचशें हात, दक्षिणेस अडीचशें हात, पूर्वेस
अडीचशें हात व पश्चिमेस अडीचशें हात, असावी.
१८ या समर्पित प्रदेशाला लागून असलेला लांबीकडील
भाग पूर्वेस दहा हजार हात व पश्चिमेस दहा हजार
हात, म्हणजे अर्थात् समर्पित भागाला लागून उरलेला जो
प्रदेश त्याच्या उत्पन्नानें नगरांतील कामधंदा करणाऱ्यांचें
पोषण व्हावें. १९ सगळ्या इस्राएल वंशांतील कामधंदा
करणाऱ्या नगरांतल्या लोकांनीं त्या भागाची मशागत
करावी. २० सगळें समर्पित क्षेत्र पंचवीस हजार हात
लांब व पंचवीस हजार हात रुंद असावें; या पवित्र
समर्पित अंशाचा चतुर्थांश नगराच्या वतनासाठीं द्यावा.
२१ तो समर्पित भाग व नगराचें वतन याच्या
अलीकडेपलीकडे उरलेला भाग अधिपतीचा असावा;
वंशांस दिलेल्या भागांस लागून पंचवीस हजार हात

१ **पाठभेद**: काव्या; हाच पाठभेद या अध्यायांत इतर स्थळींहि समजावा.

समर्पित जागेच्या पूर्वसीमेवर, तसेंच पंचवीस हजार
हात जागेच्या पश्चिमसीमेवर असलेले भाग अधिपतीचे
असावे; समर्पित भाग व मंदिराचें पवित्रस्थान हीं त्या
दोहों भागांच्या मध्यें असावीं. २२ या प्रकारें लेव्यांचें
वतन व नगराचें वतन हीं अधिपतीच्या वतनाच्या-
मध्यें आहेत; व हें अधिपतीचें वतन यहूदाप्रांत व
बन्यामीनप्रांत यांच्या दरम्यान आहे; हा भाग
अधिपतीचा होय.
२३ वरकड वंशांचा भाग पूर्वपश्चिम आहे; त्यांतला
एक बन्यामिनाचा विभाग. २४ बन्यामिनाच्या सरहद्दीला
लागून असलेला पूर्वपश्चिम प्रदेश तो शिमोनाचा विभाग.
२५ शिमोनाच्या सरहद्दीला लागून असलेला पूर्वपश्चिम
प्रदेश तो इस्साएलाचा विभाग. २६ इस्साखाराच्या सरह-
द्दीला लागून असलेला पूर्वपश्चिम प्रदेश तो जबुलूनाचा
विभाग. २७ जबुलूनाच्या सरहद्दीला लागून असलेला पूर्व-
पश्चिम प्रदेश तो गादाचा विभाग. २८ दक्षिणेस गादाची
सरहद्द तामारपासून मरीबथ-कादेश येथील पाण्यापर्यंत व
मिसर देशाच्या नाल्याच्या बाजूनें थेट मोठ्या समुद्रा-
पर्यंत. २९ ही भूमि तुम्हीं चिठ्या टाकून इस्राएल वंशांस
वतनासाठीं वांटून द्यावी; हे त्यांचे विभाग आहेत,
असें प्रभु परमेश्वर म्हणतो.
३० उत्तरदिशेस नगराबाहेरील रहदारीच्या क्षेत्राचें
माप साडेचार हजार हात असावें. ३१ नगराच्या वेशी
इस्राएल वंशांच्या नांवाप्रमाणें असाव्या; उत्तरेकडे तीन
वेशी असाव्या: रऊबेन वेस, यहूदा वेस व लेवी वेस.
३२ पूर्वदिशेच्या रहदारीच्या क्षेत्राचें माप साडेचार
हजार हात असावें; तेथें तीन वेशी असाव्या: योसेफ
वेस, बन्यामीन वेस व दान वेस. ३३ दक्षिणदिशेच्या
रहदारीच्या क्षेत्राचें माप साडेचार हजार हात असावें;
तेथेंहि तीन वेशी असाव्या: शिमोन वेस, इस्साखार
वेस व जबुलून वेस. ३४ पश्चिमदिशेच्या रहदारीच्या
क्षेत्राचें माप साडेचार हजार हात असावें; तेथेंहि तीन
वेशी असाव्या: गाद वेस, आशेर वेस व नफताली
वेस. ३५ या प्रकारें रहदारीचें एकंदर क्षेत्र अठरा
हजार हात असावें; या नगराचें नांव येथून पुढें याव्हे-
शाम्मा (एथें परमेश्वर आहे) असें पडेल.

# दानीएल



१ यहूदाचा राजा यहोयाकीम याच्या कार-
१ कीर्दीच्या तिसऱ्या वर्षी बाबेलाचा राजा नबुखद्नेस्सर
यानें यरुशलेमावर चढाई करून त्याला वेढा घातला.
२ प्रभूनें यहूदाचा राजा यहोयाकीम यास त्याच्या हातीं
दिलें; त्याप्रमाणेंच देवाच्या मंदिरांतील कांहीं पात्रेंहि
त्याच्या हातीं दिलीं; त्यानें तीं शिनार देशीं आपल्या
दैवताच्या घरीं नेलीं आणि आपल्या दैवताच्या भांडा-
रांत ठेविलीं. ३ राजानें आपल्या खोजांचा नायक
अश्पनज यास आज्ञा केली कीं इस्राएली राजकुलांपैकीं
व सरदारघराण्यांपैकीं ४ अव्यंग, सुरूप, सर्व व्यवहारांत
दक्ष; ज्ञानसंपन्न, विद्यापारंगत आणि राजवाड्यांत
वागण्यास योग्य; असे तरुण पुरुष घेऊन यावे आणि
यांस खास्द्यांची विद्या व भाषा शिकवावी. ५ राजा खात
असे त्या मिष्टान्नांतून व पीत असे त्या द्राक्षारसांतून त्यांचें
नित्य खाणेंपिणें चालून तीन वर्षेंपर्यंत त्यांचें संगोपन
व्हावें; ही मुदत संपल्यावर त्यांनीं राजाच्या हुजुरास
यावें, अशी राजानें आज्ञा केली. ६ त्या तरुण मंडळींत
यहूदा वंशांतले दानीएल, हनन्या, मीशाएल व
अजऱ्या हे होते. ७ खोजांच्या सरदारानें त्यांस
एणेंप्रमाणें नांवें दिलीं: दानीएलास बेल्टशस्सर,

हनन्यास शद्रख, मीशाएलास मेशख व अजऱ्यास अबेदनगो.

८ राजा खात असे तें मिष्टान्न व पीत असे तो द्राक्षारस यांचा आपणांस विटाळ होऊं देऊं नये असा दानीएलानें मनाचा निश्चय केला; म्हणून त्यानें खोजांच्या सरदारास विनंति केली कीं मला यांचा विटाळ नसावा. ९ खोजांच्या सरदाराची दानीएलावर कृपा व दया व्हावी असें देवानें केलें. १० खोजांचा सरदार दानीएलास म्हणाला, माझा धनी राजा यानें तुमचें खाणेंपिणें नेमून ठेविलें आहे; त्याचा मला धाक आहे; तुमच्या वयाच्या इतर तरुणांपेक्षां तुमचीं मुखें म्लान झालेलीं त्याला कां दिसावीं? राजापुढें माझें डोकें उडविलें जाण्याचा प्रसंग तुम्हीं कां आणावा? ११ तेव्हां खोजांच्या सरदारानें दानीएल, हनन्या, मीशाएल, व अजऱ्या यांवर जो कारभारी नेमिला होता त्यास दानीएलानें म्हटलें, १२ दहा दिवस आपल्या या दासांवर, एवढा प्रयोग करून पाहा; आम्हांस खावयास शाकान्न व प्यावयास नुसतें पाणी मात्र दे. १३ मंतर आमचीं तोंडें पाहा; आणि राजघरचें अन्न खाणाऱ्या तरुणांचींहि तोंडें पाहा; मग तुझ्या नजरेस येईल असें तुझ्या या दासांचें कर.

१४ त्यानें त्यांची ही विनंति ऐकून दहा दिवस त्यांजवर हा प्रयोग केला. १५ दहा दिवसांनंतर राजघरचें अन्न खाणाऱ्या सर्व तरुणांपेक्षां त्यांचे चेहरे अधिक सुरूप दिसून ते अंगानेंहि अधिक धष्टपुष्ट झाले. १६ तेव्हां तो कारभारी त्यांचें नेमिलेलें अन्न व द्राक्षारस देण्याचें बंद करून त्यांस शाकान्न देऊं लागला.

१७ या चौघां तरुणांस देवानें सर्व विद्या व ज्ञान यांत निपुण व प्रवीण केलें; दानीएल हा सर्व दृष्टांत व स्वप्नें यांचा उलगडा करण्यांत तरबेज झाला. १८ नबुखद्नेस्सर राजानें त्यांस आपल्यासमोर हजर करण्याची मुदत ठरविली होती ती संपल्यावर खोजांच्या सरदारानें त्याच्यासमोर त्यांना हजर केलें; १९ तेव्हां राजानें त्यांजबरोबर भाषण केलें; त्या सर्वांमध्यें दानीएल, हनन्या, मीशाएल व अजऱ्या यांच्या तोडीचे कोणी दुसरे दिसून आले नाहींत; म्हणून ते राजाच्या हुजुरास राहूं लागले. २० ज्ञानाच्या व विवेकाच्या बाबतींत राजा त्यांस जें कांहीं विचारी त्यांत ते त्याच्या अवघ्या राज्यांत असलेल्या सर्व ज्योतिष्यांपेक्षां व मांत्रिकांपेक्षां दसपट हुशार आहेत असें त्यांस दिसून येई. २१ दानीएल हा कोरेश राजाच्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षापर्यंत तेथें राहिला.

२ १ नबुखद्नेस्सराला त्याच्या कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षी स्वप्नें पडलीं, तेणेंकरून त्याच्या मनाला तळमळ लागली आणि त्याची झोप उडाली. २ तेव्हां राजानें हुकूम केला कीं माझीं स्वप्नें काय आहेत तें सांगावयाला ज्योतिषी, मांत्रिक, जादूगार व खास्दी यांस बोलावून आणा; मग ते सर्व राजासमोर हजर झाले. ३ राजा त्यांस म्हणाला, मला पडलेलें स्वप्न समजण्याविषयीं माझ्या मनाला तळमळ लागली आहे. ४ ते खास्दी, अरामी भाषेंत राजाला म्हणाले, महाराज, चिरायु असा; आपलें स्वप्न आपल्या या दासांस सांगा, म्हणजे आम्ही त्याचा अर्थ सांगूं. ५ राजानें खास्द्यांस म्हटलें कीं माझा ठराव होऊन चुकला आहे कीं माझें स्वप्न व त्याचा अर्थ हीं मला तुम्हीं कळविलीं नाहींत तर तुमचे तुकडेतुकडे करून तुमचीं घरें उकिरडे करावे; ६ पण तुम्ही स्वप्न व त्याचा अर्थ मला सांगाल तर तुम्हांस मजकडून देणग्या, इनामें व मोठा मान मिळेल; यास्तव स्वप्न व त्याचा अर्थ मला सांगा. ७ ते पुनः त्याला म्हणाले, महाराजांनीं आपलें स्वप्न आपल्या या दासांस सांगावें म्हणजे आम्ही त्याचा अर्थ सांगूं. ८ तेव्हां राजानें म्हटलें, मला खात्रीनें वाटतें कीं तुम्ही वेळ काढीत आहां, कारण तुम्हांस ठाऊक आहे कीं माझा ठराव होऊन चुकला आहे. ९ तुम्ही मला स्वप्न सांगणार नाहीं तर तुमच्यासंबंधानें एकच हुकूम होणार; हा प्रसंग टळावा म्हणून तुम्हीं खोट्यानाट्या गोष्टी सांगावयाचा बेत केला आहे. माझें स्वप्न मला सांगा म्हणजे त्याचा अर्थ तुम्हांस सांगतां येईल किंवा नाहीं हें मला कळेल. १० खास्द्यांनीं राजास उत्तर केलें, महाराजांची ही गोष्ट सांगेल असा कोणी मनुष्य साऱ्या दुनियेंत नाहीं; असली गोष्ट ज्योतिष्यांस, मांत्रिकांस किंवा खास्द्यांस कोणाहि थोर व पराक्रमी राजानें आजपर्यंत विचारिली नाहीं. ११ महाराज जी गोष्ट विचारितात ती दुर्घट आहे; मानवांत वास न करणाऱ्या

देवांशिवाय कोणाच्यानें ती महाराजांच्या हुजुरास सांगवणार
नाहीं. १२ हें ऐकून राजा क्रोधानें संतप्त झाला आणि बाबे-
लाच्या सर्व ज्ञान्यांचा वध करावा अशी त्यानें आज्ञा केली.
१३ ज्ञान्यांचा वध करावा हा हुकूम सुटला, तेव्हां
दानीएलाचा व त्याच्या सोबत्यांचा वध करावा म्हणून
लोक त्यांस शोधूं लागले. १४ राजाच्या गारद्यांचा नायक
अर्योक हा बाबेलच्या ज्ञान्यांचा वध करण्यास निघाला
होता, त्याजबरोबर दानीएलानें चातुर्याचें व सुज्ञतेचें
भाषण केलें. १५ त्यानें राजाचा सरदार अर्योक यास
म्हटलें, अशी निकडीची राजाज्ञा कां? तेव्हां अर्योकानें
दानीएलास ती हकीकत सांगितली. १६ मग दानीएलानें
राजाकडे जाऊन विनंति केली कीं मला अवकाश
द्यावा म्हणजे मी हुजुरास स्वप्नाचा अर्थ सांगेन.

१७ यावर दानीएलानें आपल्या घरीं जाऊन आपले
सोबती हनन्या, मीशाएल व अजऱ्या यांस ही हकीकत
कळविली; १८ आणि बाबेलच्या इतर ज्ञान्यांबरोबर
आपला व आपल्या सोबत्यांचा घात होऊं नये म्हणून
दानीएलानें त्यांस विनंति केली कीं या रहस्यासंबंधानें
स्वर्गीय देवानें आपणांवर दया करावी असें त्याजवळ
मागावें. १९ मग रात्रीं दृष्टांतांत हें रहस्य दानीएलास
प्रगट झालें; त्यावरून दानीएलानें स्वर्गीय देवाचा धन्यवाद
केला. २० दानीएल म्हणाला, देवाचें नाम युगानुयुग
धन्यवादित असो; कारण ज्ञान व बल हीं त्याचींच
आहेत; २१ तोच प्रसंग व समय बदलतो; तो राजांस
स्थानापन्न अगर स्थानभ्रष्ट करितो; तो ज्ञान्यांस ज्ञान देतो
व बुद्धिमानांस बुद्धि देतो; २२ तो गहन व गूढ गोष्टी
प्रगट करितो; अंधारांत काय आहे हें त्याला ठाऊक
असतें; त्याच्याजवळ प्रकाश वसतो. २३ हे माझ्या
पूर्वजांच्या देवा, मीं तुझे उपकार मानितों व तुझें
स्तवन करितों कीं तूं मला ज्ञान व बल हीं दिलीं आहेत,
आणि ज्यांसाठीं आम्हीं तुला विनविलें तें तूं मला आतां कळ-
विलें आहे: तूं आम्हांस राजाची गोष्ट कळविली आहे.
२४ ह्यावर दानीएल, ज्या अर्योकास राजानें बाबेलाच्या
ज्ञानी पुरुषांचा वध करण्यास नेमिलें होतें त्याजकडे
जाऊन म्हणाला, बाबेलाच्या ज्ञान्यांचा वध करूं
नका; मला महाराजांपुढें न्या म्हणजे त्यांला स्वप्नाचा
अर्थ सांगतों.

२५ तेव्हां अर्योकानें दानीएलास त्वरेनें राजाकडे
नेऊन म्हटलें, राजास स्वप्नाचा अर्थ सांगणारा असा एक
पुरुष बंदिवान करून आणिलेल्या यहूद्यांमध्यें मला आढ-
ळला आहे. २६ बेल्टशस्सर हें नांव मिळालेल्या दानी-
एलास राजानें म्हटलें, मीं जें स्वप्न पाहिलें तें व त्याचा
अर्थ मला सांगावयास तूं समर्थ आहेस काय? २७
दानीएलानें राजाला उत्तर दिलें कीं सरकारनीं जें रहस्य
विचारिलें आहे तें ज्ञानी, मांत्रिक, ज्योतिषी व दैवज्ञ
यांस राजाला सांगतां येणार नाहीं; २८ तरी रहस्यें प्रगट
करणारा देव स्वर्गांत आहे आणि त्यानें पुढील काळीं काय
होणार हें नबुखद्नेस्सर महाराजांला कळविलें आहे. आपलें
स्वप्न, आपण बिछान्यावर पडला असतां आपणाला झालेला
दृष्टांत असा आहे: २९ महाराज, आपली गोष्ट अशी कीं या-
पुढें काय घडणार हे विचार आपण बिछान्यावर पडला असतां
आपल्या मनांत आले, आणि यापुढें काय होणार हें रहस्यें
प्रगट करणाऱ्या देवानें आपणाला कळविलें आहे. ३०
आतां माझी गोष्ट अशी आहे कीं हें रहस्य मला प्रगट झालें
आहे तें मी कांहीं इतर मानवांपेक्षां अधिक बुद्धिमान् आहे
म्हणून नव्हे, तर महाराजांला स्वप्नाचा अर्थ प्रगट व्हावा व
आपणाला आपल्या मनांतील विचार समजावे म्हणून झालें
आहे.

३१ महाराज, आपण दृष्टांत पाहिला त्यांत एक मोठा
पुतळा आपल्या नजरेस पडला. हा पुतळा भव्य व तेजः-
पुंज असा आपणापुढें उभा होता; त्याचें रूप विक्राळ होतें.
३२ त्या पुतळ्याचें शीर उत्तम सोन्याचें, त्याची छाती
व हात रुप्याचे, त्याचें पोट व मांड्या पितळेच्या,
३३ त्याचे पाय लोखंडाचे व त्याच्या पावलांचा कांहीं
भाग लोखंडाचा व कांहीं मातीचा होता. ३४ आपण स्वप्न
पाहत असतां, कोणाचा हात न लागतां, एक पाषाण
आपोआप सुटला व त्या पुतळ्याच्या लोखंडी व मातीच्या
पावलांवर आदळून त्यांचे फुटून तुकडेतुकडे झाले.
३५ तेव्हां लोखंड, माती, पितळ, रुपें व सोनें यांचें
चूर्ण होऊन उन्हाळखळ्यांतील भुसाप्रमाणें तीं झालीं.

वाऱ्यानें तीं उधळून नेलीं; त्यांचा मागमूस राहिला नाहीं; त्या पुतळ्यावर आदळलेल्या पाषाणाचा एक मोठा पर्वत होऊन त्यानें सर्व पृथ्वी व्यापिली. ३६ हेंच आपलें स्वप्न. आतां याचा अर्थ राजाच्या हुजुरास आम्ही सांगतों.

३७ महाराज, आपण राजाधिराज असून आपल्याला स्वर्गीय देवानें राज्य, पराक्रम, बल व वैभव हीं दिलीं आहेत; ३८ आणि जेथें जेथें मनुष्यजातीचा निवास आहे, तेथील वनपशु व अंतराळांतील पक्षी त्यानें आपल्या अधीन केले आहेत, त्या सर्वांवर आपण सत्ता ठेविली आहे; सुवर्णाचें शीर आपणच आहां. ३९ आपल्यानंतर आपल्याहून कनिष्ठ असें राज्य उत्पन्न होईल; आणि पितळेचें असें तिसरें राज्य होईल; तें सर्व पृथ्वीवर सत्ता चालवील. ४० चौथें राज्य लोखंडासारखें मजबूत होईल; लोखंड सर्वांचा भुगाभुगा करितें तसें तें राज्य चूर्ण करणाऱ्या लोखंडासारिखें सर्वांचें चूर्ण करील. ४१ आपण त्या पुतळ्याचीं पावलें व पावलांचीं बोटें पाहिलीं; त्यांचा कांहीं भाग कुंभाराच्या मातीचा व कांहीं भाग लोखंडाचा होता; तसें हें राज्य द्विविध होईल; तरी मातीशीं लोखंड मिसळलेलें आपण पाहिलें तशी त्या राज्यांत लोखंडाची मजबुती राहील. ४२ त्या पुतळ्याच्या पावलांचीं बोटें कांहीं भाग लोखंडाचीं व कांहीं भाग मातीचीं होतीं; तसें तें राज्य अंशतः बळकट व अंशतः भंगुर असें होईल. ४३ लोखंड मातीबरोबर मिसळलेलें आपण पाहिलें, तसें त्या राज्यांतले लोक इतर लोकांबरोबर संबंध जोडितील; पण असें लोखंड मातीबरोबर एकजीव होत नाहीं, तसे तेहि त्यांच्याबरोबर एकजीव होणार नाहींत. ४४ त्या राजांच्या अमदानींत स्वर्गीय देव एका राज्याची स्थापना करील, त्याचा कधीं भंग होणार नाहीं; त्याचें प्रभुत्व दुसऱ्याच्या हातीं कधीं जाणार नाहीं; तर तें या सर्व राज्यांचें चूर्ण करून त्यांस नष्ट करील व तें सर्वकाळ टिकेल. ४५ आपण स्वप्नांत असें पाहिलें कीं कोणाचा हात न लागतां त्या पर्वतापासून एक पाषाण आपोआप सुटका आणि त्यानें लोखंड, पितळ, माती, रुपें व सोनें यांचें चूर्ण केलें; यावरून पुढें काय होणार हें त्या थोर देवानें, महाराजांच्या हुजुरास कळविलें आहे; हेंच आपलें स्वप्न, व त्याचा अर्थहि निःसंशय हाच आहे.

४६ तेव्हां नबुखद्नेस्सर राजानें पालथें पडून दानीएलास साष्टांग नमस्कार घातला आणि त्याजपुढें नैवेद्य ठेवून त्याला धूप दाखवा अशी आज्ञा केली. ४७ राजानें दानीएलास म्हटलें, तुमचा देव खरोखर देवाधिदेव व राजराजेश्वर आहे, आणि तुला हें रहस्य प्रगट करितां आलें म्हणून तो रहस्यें प्रगट करणारा देव आहे. ४८ मग राजानें दानीएलास थोर पदास चढविलें, त्याला मोठमोठीं इनामें दिलीं, त्याला सगळ्या बाबेल परगण्याची सत्ता दिली आणि त्यास बाबेलाच्या सर्व ज्ञान्यांच्या प्रमुखांचा अध्यक्ष केलें. ४९ राजानें दानीएलाच्या विनंतीवरून शद्रख, मेशख व अबेद्नगो यांस बाबेल परगण्याचा कारभार सांगितला; दानीएल राजदरबारीं असे.

३ १ नबुखद्नेस्सर राजानें सुवर्णाची एक मूर्ति केली, तिची उंची साठ हात व रुंदी सहा हात होती; तिची स्थापना त्यानें बाबेल परगण्यांतील दूरा नामक मैदानांत केली. २ ही जी मूर्ति नबुखद्नेस्सर राजानें स्थापिली होती तिची प्रतिष्ठा करण्यासाठीं त्यानें राजप्रतिनिधि, नायब अधिपति, सरदार, मंत्री, भांडारी, न्यायपंडित, न्यायाधीश व सुभ्यांचे सर्व अधिकारी यांनीं एकत्र जमावें म्हणून त्यांस बोलावणें केलें. ३ तेव्हां राजप्रतिनिधि, नायब अधिपति, सरदार, मंत्री, भांडारी, न्यायपंडित, न्यायाधीश व सुभ्यांचे सर्व अधिकारी हे नबुखद्नेस्सर राजानें स्थापिलेल्या मूर्तीची प्रतिष्ठा करण्यास एकत्र जमले आणि तिच्यासमोर उभे राहिले. ४ मग एका भाटानें मोठ्यानें घोषणा केली कीं, अहो लोकांनो, निरनिराळ्या राष्ट्रांतील निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्या लोकांनो, तुम्हांस आज्ञा होत आहे कीं ५ शिंग, बासरी, सतार, सारंगी, वीणा, पुंगी वगैरे वाद्यांचा ध्वनि तुमच्या कानीं पडतांच नबुखद्नेस्सर राजानें जी सुवर्ण मूर्ति स्थापिली आहे तिच्यापुढें तुम्ही साष्टांग दंडवत घाला; ६ जो कोणी तिला साष्टांग दंडवत घालणार नाहीं त्याला तत्क्षणींच धगधगीत अग्नीच्या

भट्टींत टाकितील. ७ ह्यासाठीं शिंग, बासरी, सतार,
सारंगी, वीणा वगैरे वाद्यांचा ध्वनि कानीं पडतांच
निरनिराळ्या राष्ट्रांतील निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्या
सर्व लोकांनीं नबुखद्नेस्सर राजानें स्थापिलेल्या त्या
सुवर्ण मूर्तीपुढें साष्टांग दंडवत घातलें.

८ यावर कित्येक खास्द्यांनीं राजाकडे जाऊन यहूद्यांवर
दोषारोप केला. ९ ते नबुखद्नेस्सर राजास म्हणाले, महा-
राज, चिरायु व्हा. १० महाराज, आपण हुकूम केला कीं शिंग,
बासरी, सतार, सारंगी, वीणा, पुंगी वगैरे वाद्यांचा ध्वनि ज्या
ज्या मनुष्याच्या कानीं पडेल त्यानें सुवर्ण मूर्तीपुढें साष्टांग
दंडवत घालावें; ११ आणि जो कोणी साष्टांग दंडवत
घालणार नाहीं त्याला धगधगीत अग्नीच्या भट्टींत
टाकावें; १२ पण आपण बाबेल परगण्यावर नेमिलेले
शद्रख, मेशख, अबेद्नगो या नांवांचे कोणी यहूदी
आहेत त्यांनीं, महाराज, आपली पर्वा केली नाहीं; ते
आपल्या देवांची उपासना करीत नाहींत आणि आपण
स्थापिलेल्या सुवर्ण मूर्तीची पूजा करीत नाहींत.

१३ हें ऐकून नबुखद्नेस्सरानें क्रोधानें संतप्त होऊन
शद्रख, मेशख व अबेद्नगो यांस घेऊन येण्याची आज्ञा
केली. तेव्हां लोकांनीं त्यांस राजापुढें आणिलें. १४ नबुखद्ने-
स्सर त्यांस म्हणाला, अरे शद्रखा, मेशखा, अबेद्-
नगो, तुम्ही माझ्या देवांची उपासना करीत नाहीं, व
मीं स्थापिलेल्या सुवर्ण मूर्तीची पूजा करीत नाहीं,
असें तुम्ही मुद्दाम करितां काय ? १५ आतां शिंग,
बासरी, सतार, सारंगी, वीणा, पुंगी वगैरे वाद्यांचा
ध्वनि ऐकतांच मीं केलेल्या मूर्तीपुढें तुम्ही साष्टांग
दंडवत घातलें तर बरें; नाहीं घातलें तर तुम्हांस
धगधगीत अग्नीच्या भट्टींत ताबडतोब टाकण्यांत येईल;
माझ्या हातांतून तुम्हांस सोडवील असा कोणता देव
आहे ? १६ शद्रख, मेशख व अबेद्नगो यांनीं राजास
उत्तर केलें कीं, महाराज, या बाबतींत आपणाला उत्तर
देण्याचें आम्हांस प्रयोजन दिसत नाहीं. १७ ज्या देवाची
आम्ही उपासना करितों तो आम्हांस धगधगीत अग्नीच्या
भट्टींतून सोडवावयाला समर्थ आहे; महाराज, तो
आम्हांस आपल्या हातांतून सोडवील. १८ तें कसेंहि असो,
पण महाराज हें आपण पक्कें समजा कीं आम्ही आपल्या देव-
तांची उपासना करणार नाहीं आणि आपण स्थापिलेल्या सुवर्ण
मूर्तीला दंडवत घालणार नाहीं. १९ हें ऐकून नबुखद्ने-
स्सर संतापला; शद्रख, मेशख व अबेद्नगो यांच्या-
संबंधानें त्याची मुद्रा पालटली; आणि त्यानें आज्ञा केली
कीं, भट्टी नेहमींपेक्षां सातपट तप्त करा. २० मग त्यानें
आपल्या सैन्यांतील कांहीं बलिष्ठ पुरुषांस आज्ञा केली
कीं शद्रख, मेशख व अबेद्नगो यांच्या मुसक्या बांधून
त्यांस त्या तप्त अग्नीच्या भट्टींत टाका. २१ तेव्हां त्या
पुरुषांस त्यांचे पायमोजे, अंगरखे, झगे वगैरे वस्त्रांसहित
बांधून धगधगीत अग्नीच्या भट्टींत टाकिलें. २२ राजाचा
हुकूम अगदीं सक्त असल्यामुळें ती भट्टी फारच तप्त
केली होती; म्हणून ज्या पुरुषांनीं शद्रख, मेशख व
अबेद्नगो यांस तिजवर नेलें ते ज्वालांनीं भाजून
मेले. २३ शद्रख, मेशख व अबेद्नगो हे तिघे पुरुष मुसक्या
बांधिलेले असे त्या धगधगीत अग्नीच्या भट्टींत पडले.

२४ नंतर नबुखद्नेस्सर राजा चकित होऊन
पटकन उठला; तो आपल्या मंत्र्यांस म्हणाला, आपण
अग्नींत तिघां जणांस बांधून टाकिलें ना ? त्यांनीं राजास
उत्तर केलें, होय सरकार, असें खरें. २५ तो म्हणाला,
पाहा ! चार इसम अग्नींत मोकळे फिरत आहेत असें
मला दिसतें; त्यांस कांहींएक इजा पोहंचली नाहीं;
चौथ्याचें स्वरूप तर एकाद्या देवपुत्रासारखें आहे.
२६ मग नबुखद्नेस्सर त्या धगधगीत अग्नीच्या भट्टीच्या
द्वारानजीक येऊन म्हणाला, अहो शद्रख, मेशख व
अबेद्नगो, परात्पर देवाचे सेवकहो, अग्नींतून बाहेर
या. तेव्हां शद्रख, मेशख व अबेद्नगो अग्नींतून बाहेर
आले; २७ आणि राजप्रतिनिधि, नायब अधिपति,
सरदार व राजमंत्री जे तेथें जमले होते त्यांनीं
या पुरुषांस पाहिलें तों त्यांच्या शरीरांवर अग्नीचा
परिणाम झाला नव्हता, त्यांच्या डोक्याचा एक केसहि
होरपळला नव्हता, त्यांच्या पायमोजांला कांहीं झालें
नव्हतें आणि अग्नीचा गंधहि त्यांस लागला नव्हता.

२८ तेव्हां नबुखद्नेस्सर म्हणाला, शद्रख, मेशख व
अबेद्नगो यांनीं आपल्या देवावर भाव ठेविला,

राजाचा शब्द मोडिला, आपल्या देवाखेरीज अन्य
देवाची सेवा व उपासना करावयाची नाहीं म्हणून
त्यांनीं आपले देह अर्पिले; त्यांस त्यांच्या देवानें आपला
दिव्यदूत पाठवून सोडविलें आहे; त्याचा धन्यवाद
असो. २९ यास्तव मी फर्मावितों कीं सर्व लोक, प्रत्येक
राष्ट्राचे व प्रत्येक भाषा बोलणारे लोक, यांपैकीं जे
कोणी शद्रख, मेशख व अबेद्नगो यांच्या देवा-
विरुद्ध कांहीं बोलतील त्यांचे तुकडेतुकडे करण्यांत
येतील; त्यांच्या घराचे उकिरडे करण्यांत येतील;
कारण अशा प्रकारें सोडविण्यास समर्थ दुसरा कोणी
देव नाहीं. ३० नंतर राजानें शद्रख, मेशख व अबेद्नगो
यांस बाबेल परगण्यांत मोठ्या हुद्द्यास चढविलें.

४ १ नबुखद्नेस्सर राजा याजकडून सर्व पृथ्वीवर
राहणाऱ्या सर्व लोकांस, सर्व राष्ट्रांच्या व सर्व भाषा
बोलणाऱ्या लोकांस: तुमचें कल्याण असो!
२ परात्पर देवानें जीं चिन्हें व जे अद्भुत चमत्कार
मजसंबंधानें दाखविले तीं विदित करावीं हें मला बरें
वाटलें आहे. ३ त्याचीं चिन्हें किती थोर! त्याच्या
अद्भुत चमत्कारांचा प्रभाव केवढा! त्याचें राज्य
सर्वकालचें आहे व त्याचें प्रभुत्व पिढ्यानपिढ्या
राहणारें आहे.

४ मी नबुखद्नेस्सर आपल्या गृहांत चैनींत होतों,
आपल्या मंदिरांत समृद्ध होतों. ५ मीं स्वप्न पाहिलें
त्यानें मी भयभीत झालों; मी पलंगावर पडलों असतां
माझे विचार व माझ्या मनांत घोळत असलेल्या कल्पना
यांनीं मीं चिंताक्रांत झालों. ६ तेव्हां मीं आज्ञा केली
कीं मला स्वप्नाचा अर्थ सांगण्यासाठीं बाबेलांतील सर्व
ज्ञानी पुरुषांस मजकडे आणावें. ७ तेव्हां ज्योतिषी,
मांत्रिक, खास्दी व दैवज्ञ हे वाड्यांत आल्यावर मीं
आपलें स्वप्न त्यांच्यापुढें मांडिलें; पण त्यांनीं त्याचा अर्थ
मला सांगितला नाहीं. ८ सरतेशेवटीं दानीएल मजपुढें
आला; त्याचें माझ्या देवाच्या नांवावरून बेल्टशस्सर
हें नांव ठेविलें आहे; व त्याच्या ठायीं पवित्र देवांचा
आत्मा वसत आहे; त्याला मीं आपलें स्वप्न सांगितलें.
९ मीं म्हणालों, हे बेल्टशस्सरा, ज्योतिष्यांच्या
अध्यक्षा, पवित्र देवांचा आत्मा तुझ्या ठायीं आहे व
कोणतेंहि रहस्य तुला समजावयाला अवघड नाहीं हें
मला ठाऊक आहे, तर मीं पाहिलेल्या स्वप्नांतील दृष्टांत
व त्यांचा अर्थ मला सांग.

१० मी आपल्या पलंगावर पडलों असतां माझ्या
मनांत जे दृष्टांत घोळत होते ते हे: मीं पाहिलें, तों
पृथ्वीच्या मध्यभागीं एक वृक्ष होता, त्याची उंची फार
मोठी होती. ११ तो वृक्ष वाढून मजबूत झाला, त्याची
उंची गगनास पोहंचली व तो सगळ्या पृथ्वीच्या दिगं-
तांपर्यंत दिसूं लागला. १२ त्याला सुंदर पानें होतीं,
त्यावर फळें विपुल असून सर्वांस खावयाला पुरतशीं होतीं;
वनपशु त्याच्या आश्रयानें राहत, अंतराळांतील पक्षी
त्याच्या शाखांमध्यें वस्ती करीत, व त्या वृक्षावर सर्व
मनुष्यांचें पोषण होत असे. १३ मी पलंगावर पडलों
असतां माझ्या मनांत दृष्टांत घोळत होते, त्यांत मीं
पाहिलें कीं एक जागल्या, पवित्र पुरुष, आकाशांतून उत-
रला. १४ तो मोठ्यानें पुकारून म्हणाला, हा वृक्ष तोडून
टाका, ह्याच्या फांद्या छेदा, ह्याचीं पानें झाडून टाका व
ह्याचीं फळें विखरा; ह्याच्याखालीं राहत असलेले पशु
निघून जावोत, व पक्षी ह्याच्या शाखांतून उडून जावोत.
१५ तरी पण ह्याचें बुंध जमिनींत राहूं द्या; ह्यास लोखंड
व पितळ यांच्या पट्टयानें बांधून रानांतल्या कोवळ्या गव-
तांत राहूं द्या; ह्यास आकाशांतल्या दहिंवरानें भिजूं द्या;
भूमीवरील गवताचा वांटा ह्याला वनपशूंबरोबर मिळो;
१६ ह्याचें मानवहृदय जाऊन ह्यास पशुहृदय प्राप्त होवो;
व सात काळ त्याजवरून जावोत. १७ हें शासन त्या
जागल्यांच्या ठरावाअन्वयें व पवित्र जनांच्या वचनानुसार
झालें; तें अशासाठीं कीं मानवी राज्यावर परात्पर देवाची
सत्ता आहे, व तो तें पाहिजे त्यास देतो आणि
त्यावर अगदीं हलक्या प्रतीच्या मनुष्यांपैकीं पाहिजे
त्याला नेमितो, हें सर्व जीवधाऱ्यांना समजावें. १८ हें
स्वप्न मीं नबुखद्नेस्सर राजानें पाहिलें आहे; तर आतां हे
बेल्टशस्सरा, याच्या अर्थाचा उलगडा कर, कारण
माझ्या राज्यांतील सर्व ज्ञानी पुरुषांना याचा अर्थ मला
सांगतां आला नाहीं; पण तो तुला सांगतां येईल,

कारण पवित्र देवांचा आत्मा तुझ्या ठायीं आहे.
१९ मग बेल्टशस्सर हें नांव दिलेला दानीएल
क्षणभर बुचकळ्यांत पडला व विचारांनीं त्याचें मन
व्यग्र झालें. तेव्हां राजा त्याला म्हणाला, बेल्टशस्सरा,
या स्वप्नासंबंधानें व त्याच्या अर्थासंबंधानें तूं घाबरूं
नको. तेव्हां बेल्टशस्सरानें म्हटलें, माझ्या स्वामी, हें
स्वप्न तुझ्या द्वेष्ट्यांस व त्याचा अर्थ तुझ्या वैऱ्यांस लागूं
पडो. २० तूं वृक्ष पाहिला तो वाढून मजबूत झाला,
त्याची उंची गगनास पोहंचली, तो सगळ्या पृथ्वीला
दिसूं लागला; २१ त्याचीं पानें सुंदर होतीं, त्यावर फळें
विपुल असून सर्वांस खावयाला पुरतशीं होतीं, त्याच्या-
खालीं वनपशु राहत होते व त्याच्या शाखांत अंतराळांतील
पक्षी वस्ती करीत होते; २२ हे राजा, जो वृक्ष तूंच
आहेस; तूं वाढून बलवान् झाला आहेस; तुझी थोरवी
वाढून गगनापर्यंत पोहंचली आहे, तुझें राज्य दिगंतांस
पोहंचलें आहे. २३ एक जागल्या, पवित्र पुरुष, आकाशां-
तून उतरून म्हणाला, हा वृक्ष तोडून त्याचा नाश करा;
तथापि त्याचें बुंध जमिनींत राहूं द्या; त्यास लोखंड व
पितळ यांच्या पट्ट्यानें बांधून रानांतल्या कोवळ्या
गवतांत राहूं द्या; त्यास आकाशांतल्या दहिंवरानें भिजूं
द्या, त्याला वनपशूंबरोबर वांटा मिळो, त्याजवरून सात
काळ जावोत तोंवर असें होवो, असें राजानें पाहिलें. २४ हे
राजा, याचा अर्थ असा आहे आणि माझा स्वामी राजा
याजविषयीं परात्पर देवाचा ठराव हा आहे: २५ तुला
मनुष्यांतून घालवून देतील; तुझी वस्ती वनपशूंत होईल;
तुला बैलांप्रमाणें गवत खावें लागेल; तूं आकाशांतील दहिं-
वरानें भिजशील; मानवी राज्यावर परात्पर देवाची सत्ता
आहे व तो तें पाहिजे त्यास देतो हें ज्ञान तुला होईपर्यंत
तुजवरून सात काळ जातील. २६ त्यांनीं त्या वृक्षाचें
बुंध राखून ठेवावयास सांगितलें, याचा अर्थ हा कीं सत्ता
ही स्वर्गांतील देवाची आहे हें ज्ञान तुला झालें म्हणजे
तुझें राज्य निश्चयानें तुला मिळेल; २७ म्हणून, हे
राजा, माझी मसलत तूं मान्य करावी; तूं पाप सोडून
धर्माचरण करावें; अधर्म सोडून गरिबांवर दया
करावी; अशानें कदाचित् तुझें स्वास्थ्य अधिक काळ राहील.

२८ हें सगळें नबुखद्नेस्सर राजा याजवर
गुजरलें. २९ बारा महिने लोटल्यावर तो एकदा
बाबेलच्या राजवाड्याच्या गच्चीवर फिरत होता.
३० त्या वेळीं राजा म्हणाला, हें थोर बाबेल नगर राज-
निवासासाठीं माझ्याच पराक्रमानें व माझ्या प्रतापाच्या
वैभवासाठीं मीं बांधिलें आहे ना! ३१ हे शब्द
राजाच्या मुखांतून निघतात न निघतात तोंच आकाश-
वाणी झाली कीं, हे राजा, नबुखद्नेस्सरा, हें तुला
विदित होवो कीं तुझ्या हातची राजसत्ता गेली आहे.
३२ तुला मनुष्यांतून घालवून देतील; तुझी वस्ती
वनपशूंत होईल; तुला बैलांप्रमाणें गवत खावें लागेल;
आणि मानवी राज्यावर परात्पर देवाची सत्ता आहे व
तो तें पाहिजे त्यास देतो हें ज्ञान तुला होईपर्यंत तुज-
वरून सात काळ जातील. ३३ त्याच घटकेस हें नबु-
खद्नेस्सराच्या प्रत्ययास आलें; त्याला मनुष्यांतून
घालवून दिलें व तो बैलांप्रमाणें गवत खाऊं लागला;
त्याचें शरीर आकाशांतल्या दहिंवरानें भिजूं लागलें;
येथवर कीं त्याचे केस गरुडाच्या पिसांप्रमाणें वाढले
आणि त्याचीं नखें पक्ष्यांच्या नखांसारखीं झालीं.

३४ हे दिवस संपल्यावर मीं नबुखद्नेस्सरानें आपले
डोळे आकाशाकडे लाविले; माझी बुद्धि मला परत आली;
मीं परात्पर देवाचा धन्यवाद केला, त्या सदा जीवंत
असणाऱ्या देवाचें स्तवन केलें व त्याचा महिमा
गाइला; कारण त्याचें प्रभुत्व सर्वकाळचें आहे, आणि
त्याचें राज्य पिढ्यानपिढ्या राहणारें आहे. ३५ पृथ्वी-
वरील सर्व रहिवासी केवळ कःपदार्थ होत; तो आकाशां-
तील आपल्या सैन्याचें व पृथ्वीवरील रहिवाश्यांचें
इच्छेस येईल तें करितो; तूं असें काय करितोस, असें
त्याचा हात धरून कोणाच्यानें त्याला म्हणवत नाहीं.
३६ त्याच वेळीं माझी बुद्धि मला परत आली;
माझ्या राज्याच्या वैभवास्तव माझा प्रताप व तेज
हीं मला पुनः प्राप्त झालीं; माझे मंत्री व माझे
सरदार माझ्या भेटीस आले; मी आपल्या राज्यांत
स्थापीत झालों; व मला अत्यंत मोठी थोरवी प्राप्त
झाली. ३७ आतां मी नबुखद्नेस्सर स्वर्गीच्या

राजाचें स्तवन करितों, त्याचा जयजयकार करितों व
त्याचा महिमा वर्णितों; कारण त्याचीं सर्व कृत्यें सत्य
आहेत, त्याचे सर्व मार्ग न्याय्य आहेत: जे अभि-
मानानें चालतात त्यांस त्याला नीचावस्थेंत लोटितां येतें.

५ १ बेलशस्सर राजानें आपल्या एक हजार सर-
दारांस मोठी मेजवानी केली; त्या हजारांसमक्ष तो
द्राक्षारस प्याला. २ द्राक्षारसाचें सेवन करीत असतां
बेलशस्सरानें हुकूम केला कीं माझा बाप नबुखद्नेस्सर
यानें यरुशलेमांतील मंदिरांतून जीं सोन्यारुप्याचीं पात्रें
आणिलीं आहेत तीं घेऊन या, म्हणजे मी, माझे सर-
दार, माझ्या पत्नी व उपपत्नी यांस त्यांतून द्राक्षारस
पितां येईल. ३ तेव्हां यरुशलेमांतील देवाच्या मंदिराच्या
पवित्रस्थानांतून आणिलेलीं सोन्याचीं पात्रें ते घेऊन
आले; राजा, त्याचे सरदार, त्याच्या पत्नी व उपपत्नी
हीं त्यांतून द्राक्षारस प्यालीं. ४ त्यांनीं द्राक्षारस पिऊन
सोनें, रुपें, पितळ, लोखंड, काष्ठ व पाषाण यांपासून
घडलेल्या दैवतांचें स्तवन केलें.

५ त्याच घटकेस मानवी हाताचीं बोटें प्रगट झालीं
व त्यांनीं दीपवृक्षासमोर राजवाड्याच्या भिंतीच्या
गिलाव्यावर कांहीं लिहिलें; आणि हाताचीं बोटें लिहीत
होतीं तीं राजाच्या दृष्टीस पडलीं. ६ तेव्हां राजाची
मुद्रा पालटली व तो चिंताक्रांत झाला; त्याच्या कंबरेचे
सांधे ढिले पडले, आणि त्याचे गुडघे लटपटूं लागले.
७ राजानें मोठ्यानें ओरडून म्हटलें कीं मांत्रिक, खास्दी
व दैवज्ञ यांस घेऊन या. राजा त्या बाबेलाच्या ज्ञान्यांस
म्हणाला, जो कोणी हा लेख वाचील व त्याचा अर्थ मला
सांगेल त्याला जांभळ्या रंगाचा पोशाख मिळेल, त्याच्या
गळ्यांत सोन्याचा गोफ घालण्यांत येईल व तो राज्यां-
तील तिघां अधिपतींतला एक होईल. ८ मग राजाचे
सर्व ज्ञानी पुरुष वाड्यांत आले; पण त्यांस तो लेख
वाचतां येईना व त्याचा अर्थ राजाला सांगतां येईना. ९
तेव्हां बेलशस्सर राजा फार चिंताक्रांत झाला, त्याची
मुद्रा पालटली आणि त्याचे सरदार घाबरले.

१० राजा व त्याचे सरदार यांचे शब्द ऐकून राणी
भोजनगृहांत आली. ती म्हणाली, महाराज, चिरायु असा;
आपल्या मनाला तळमळ होऊं देऊं नका; आपण आपली
मुद्रा पालटूं देऊं नका; ११ पवित्र देवांचा आत्मा ज्यांत
आहे असा एक पुरुष आपल्या राज्यांत आहे; आपल्या
बापाच्या कारकीर्दींत प्रकाश, विवेक व देवांच्या ज्ञाना-
सारखें ज्ञान हीं त्याच्या ठायीं दिसून आलीं; महाराज,
आपला बाप नबुखद्नेस्सर राजा यांनीं त्याला ज्योतिषी,
मांत्रिक, खास्दी व दैवज्ञ यांचा अध्यक्ष नेमिलें होतें;
१२ कारण उत्तम आत्मा, ज्ञान, विवेक, स्वप्नाचा अर्थ
सांगणें, कूटप्रश्न उलगडणें, कोडीं उकलणें, यांसंबंधानें,
ज्याला राजानें बेल्टशस्सर असें नांव दिलें होतें तो
दानीएल प्रवीण होता असें दिसून आलें; तर आतां
दानीएलास बोलावून आणा म्हणजे तो अर्थ सांगेल.

१३ तेव्हां दानीएलास राजापुढें आणिलें. राजा
त्यास म्हणाला, माझा बाप जो राजा त्यानें यहूदींतून
पकडून आणिलेल्या लोकांपैकीं दानीएल तो तूंच काय?
१४ मीं तुजविषयीं ऐकलें आहे कीं देवांचा आत्मा
तुझ्या ठायीं आहे आणि प्रकाश, विवेक व उत्तम
ज्ञान हीं तुझ्या ठायीं दिसून आलीं आहेत. १५ आतां
हा लेख वाचून त्याचा अर्थ करून मला सांगावा
म्हणून हे ज्ञानी व मांत्रिक लोक माझ्यापुढें आणिले,
पण त्याचा अर्थ त्यांस सांगतां येईना. १६ मीं तुज-
विषयीं ऐकलें आहे कीं, तुला स्वप्नाचा अर्थ सांगतां
येतो व कोडीं उकलतां येतात; आतां तुला हा लेख
वाचतां येऊन त्याचा अर्थ मला सांगतां आला तर
तुला जांभळ्या रंगाचा पोशाख मिळेल, तुझ्या गळ्यांत
सोन्याचा गोफ घालण्यांत येईल आणि तूं राज्यांतील
तिघां अधिपतींतला एक होशील.

१७ तेव्हां दानीएलानें राजास उत्तर दिलें कीं तुझ्या
देणग्या तुजजवळ राहूं दे, तुझीं इनामें दुसऱ्या कोणास
दे, तथापि मी हा लेख राजास वाचून दाखवितों व त्याचा
अर्थ त्याला करून सांगतों. १८ हे राजा, परात्पर देवानें
तुझा बाप नबुखद्नेस्सर यास राज्य, महत्त्व, वैभव व
महिमा हीं दिलीं; १९ त्यानें त्यास मोठेपणा दिला म्हणून
सर्व लोक, सर्व राष्ट्रांचे व सर्व भाषा बोलणारे लोक
त्याच्यापुढें थरथर कांपत व त्याला भीत; वाटेल त्यास

तो ठार मारी व वाटेल त्यास जीवंत राखी; वाटेल त्यास
तो थोर करी व वाटेल त्यास तो नीच करी. २० पुढें
त्याच्या हृदयांत ताठा शिरला, व त्याचा आत्मा कठोर
होऊन उन्मत्त झाला तेव्हां त्याला त्याच्या राजपदा-
वरून काढण्यांत व त्याचें वैभव हिरावून घेण्यांत आलें;
२१ त्याला मनुष्यांतून घालवून देण्यांत आलें; त्याचें हृदय
पशूंसारखें झालें; तो रानगाढवांमध्यें वस्ती करूं लागला;
तो बैलांप्रमाणें गवत खाई व त्याचें शरीर आकाशांतील
दहिंवरानें भिजत असे, मानवी राज्यावर परात्पर
देवाची सत्ता आहे व तो त्यावर पाहिजे त्यास स्थापितो
असें ज्ञान त्याला होईपर्यंत तो असा राहिला. २२ हे
बेलशस्सरा, तूं त्याचा पुत्र आहेस, हें सर्व तुला ठाऊक
असून तूं आपलें मन नम्र केलें नाहीं; २३ तर
स्वर्गीच्या प्रभूबरोबर तूं उद्दामपणा केला; त्याच्या
मंदिरांतील पात्रें तुजपुढें आणिलीं आहेत; तूं, तुझे
सरदार, तुझ्या पत्नी व उपपत्नी हीं त्यांतून द्राक्षारस
प्याली आहेत; आणि रुपें, सोनें, पितळ, लोखंड, काष्ठ,
व पाषाण यांचीं घडलेलीं दैवतें, ज्यांस दिसत नाहीं,
ऐकतां येत नाहीं व समजत नाहीं, त्यांचें तूं स्तवन
केलें; पण ज्याच्या हातीं तुझा प्राण आहे व ज्याच्या
स्वाधीन तुझे सर्व व्यवहार आहेत त्या देवाला मान दिला
नाहीं; २४ म्हणून त्यानें तीं हाताचीं बोटें पाठविलीं व
हा लेख लिहिला.

२५ हा लिहिलेला लेख असा: **मने, मने, तकेल,
ऊफारसीन.** २६ याचा अर्थ असा: **मने** म्हणजे देवानें
तुझ्या राज्याचा काल मोजून त्याचा अंत केला आहे.
२७ **तकेल** म्हणजे तुला तागडींत तोलिलें व तूं उणा
भरलास. २८ **परेस** म्हणजे तुझें राज्य विभागून मेदी
व पारसी यांस दिलें आहे.

२९ तेव्हां बेलशस्सरानें आज्ञा केल्यावरून त्यांनीं
दानीएलास जांभळ्या रंगाचा पोषाख लेवविला, त्याच्या
गळ्यांत सोन्याचा गोफ घातला व त्याच्यासंबंधानें सर्वत्र
द्वाही फिरविली कीं हा राज्यांतील तिघां अधिपतींतला
एक आहे.

३० त्याच रात्रीं खास्द्यांचा राजा बेलशस्सर याचा
वध झाला. ३१ आणि दारयावेश मेदी हा सुमारें बासष्ट
वर्षांचा असतां राजपदारूढ झाला.

६ १ दारयावेश राजानें आपल्या मर्जीप्रमाणें
आपल्या सर्व साम्राज्यांत एकशेंवीस प्रांताधिकारी
नेमिले; २ त्यांजवर तीन अध्यक्ष नेमिले, दानीएल
त्यांपैकीं एक होता; राजाचें कांहीं नुकसान होऊं
नये म्हणून प्रांताधिकाऱ्यांनीं आपला हिशोब
या तिघांस द्यावा असें ठरविलें. ३ दानीएल
त्या अध्यक्षांत व प्रांताधिकाऱ्यांत श्रेष्ठ ठरला,
कारण त्याच्या ठायीं उत्तम आत्मा वसत होता;
त्याला सर्व राज्यावर नेमावें असा राजाचा
विचार होता.

४ असें असतां राज्यकारभारासंबंधानें दानीएला-
विरुद्ध कांहीं तरी निमित्त शोधण्याचा प्रयत्न त्या
अध्यक्षांनीं व प्रांताधिकाऱ्यांनीं चालविला; पण त्यांस
कांहीं निमित्त किंवा दोष सांपडेना; कारण तो विश्वासू
असून त्याच्या ठायीं कांहीं चूक किंवा अपराध सांपडला
नाहीं. ५ तेव्हां तीं मनुष्यें म्हणालीं, या दानीएलाविरुद्ध
कांहीं निमित्त काढतां येणार नाहीं, मात्र त्याच्या देवाच्या
नियमासंबंधानें त्याच्याविरुद्ध कांहीं निमित्त काढतां आलें
तर येईल.

६ मग हे अध्यक्ष व प्रांताधिकारी राजाकडे जमावानें
आले व त्याला म्हणाले, दारयावेश महाराज, चिरायु
असा. ७ राज्यांतले सर्व देशाध्यक्ष, नायब अधिपति, प्रांता-
धिकारी, मंत्री व सरदार यांनीं असा विचार केला आहे
कीं अशी एक राजाज्ञा व्हावी, व अशी सक्त द्वाही फिर-
विली जावी कीं, हे राजा, तीस दिवसपर्यंत आपल्या-
शिवाय कोणाहि देवाची अथवा मानवाची आराधना
कोणी करील तर त्यास सिंहांच्या गुहेंत टाकावें. ८ तर
महाराज, ही द्वाही मंजूर करा, फर्मानावर सही
करा म्हणजे मेदी व पारसी यांच्या कधीं न पालटणाऱ्या
कायद्याच्या व्यवस्थेप्रमाणें हा ठराव पालटावयाचा नाहीं.
९ तेव्हां दारयावेश राजानें फर्मानावर व द्वाहीवर सही
केली.

१० हा फर्मानावर सही झाली आहे असें दानीएलानें
ऐकलें तेव्हां तो आपल्या घरीं गेला; त्याच्या खोलींतल्या
खिडक्या यरुशलेमाच्या दिशेकडे असून उघड्या होत्या;

त्यानें आपल्या नित्यक्रमाप्रमाणें दिवसांतून तीनदा गुडघे टेकून प्रार्थना केली व आपल्या देवाचा धन्यवाद केला. ११ त्या वेळीं तीं मनुष्यें जमावानें आलीं तों दानीएल आपल्या देवाची प्रार्थना व आराधना करीत आहे असें त्यांस आढळून आलें. १२ तेव्हां ते राजाजवळ जाऊन त्यानें फिरविलेल्या द्वाहीविषयीं त्यास म्हणाले, महाराज, तीस दिवसपर्यंत जो कोणी आपणाशिवाय कोणा देवाची अथवा मनुष्याची आराधना करील, त्यास सिंहांच्या गुहेंत टाकावें अशी द्वाही आपण फिरविली ना? राजानें उत्तर दिलें कीं, मेदी व पारसी यांच्या न पालटणाऱ्या कायद्याप्रमाणें हें निश्चित ठरविलें आहे. १३ तेव्हां ते राजास म्हणाले, महाराज, पकडून आणिलेल्या यहूद्यांपैकीं तो दानीएल, आपणाला व आपण सही केलेल्या द्वाहीला जुमानीत नाहीं; तर तो नित्य तीनदा प्रार्थना करितो.

१४ हे शब्द ऐकून राजा फार खिन्न झाला, आणि दानीएलाचा बचाव करण्याचा तो विचार करूं लागला; त्याचा बचाव करावा म्हणून त्यानें सूर्य मावळेपर्यंत प्रयत्न केला. १५ मग तीं मनुष्यें राजाकडे जमावानें आलीं व त्याला म्हणालीं, हे राजा, हें लक्षांत आण: मेदी व पारसी यांचा असा शिरस्ता आहे कीं राजानें केलेल्या द्वाह्या किंवा नियम पालटतां येत नाहींत.

१६ त्यावर राजाज्ञेवरून दानीएलास आणवून सिंहांच्या गुहेंत टाकिलें. राजा दानीएलास म्हणाला, ज्या देवाची तूं नित्य सेवा करितोस तो तुला सोडवील. १७ त्यांनीं एक शिला आणून गुहेच्या दारावर ठेविली; आणि राजानें आपल्या मुद्रेचा व आपल्या सरदारांच्या मुद्रांचा तिच्यावर शिक्का केला; तो अशासाठीं कीं दानीएलाच्या बाबतींत कांहीं एक फेरबदल होऊं नये.

१८ नंतर राजा आपल्या महालांत गेला, त्यानें ती रात्र उपाशींच काढिली; त्याच्यासमोर वाद्यें आणिलीं नाहींत; त्याची झोप उडाली. १९ मग राजा मोठ्या पहाटेस उठून त्वरेनें सिंहांच्या गुहेजवळ गेला. २० तो गुहेजवळ दानीएलाकडे जाऊन शोकस्वरानें ओरडून म्हणाला, हे दानीएला, जीवंत देवाच्या सेवका, ज्या देवाची सेवा तूं नित्य करितोस त्याला सिंहांपासून तुला सोडवितां आलें आहे काय? २१ दानीएल राजाला म्हणाला, महाराज, चिरायु असा. २२ माझ्या देवानें आपला दिव्यदूत पाठवून सिंहांचीं तोंडें बंद केलीं आहेत, त्यांनीं मला कांहींएक उपद्रव केला नाहीं; कारण त्या देवासमोर मी निरपराधी ठरलों; व महाराज आपलाहि मीं कांहीं अपराध केला नाहीं. २३ तेव्हां राजानें अत्यंत हर्षित होऊन आज्ञा केली कीं दानीएलास गुहेंतून बाहेर काढा. त्यास गुहेंतून बाहेर काढिलें तों त्याला कांहीं इजा झाल्याचें दिसून आलें नाहीं, कारण त्याचा आपल्या देवावर भरंवसा होता.

२४ तेव्हां ज्या मनुष्यांनीं दानीएलावर आरोप आणिला होता त्यांस राजाज्ञेवरून पकडून आणिलें आणि त्यांस व त्यांच्या बायकांमुलांस सिंहांच्या गुहेंत टाकिलें; तेव्हां ते सिंहांच्या तडाक्यांत सांपडून त्या गुहेच्या तळाशीं पोहचण्यापूर्वीच त्या सर्वांच्या हाडांचा त्यांनीं चुराडा केला.

२५ मग पृथ्वीवरील सर्व लोकांस, सर्व राष्ट्रांच्या व सर्व भाषा बोलणाऱ्या लोकांस, दारयावेश राजानें असें लिहून कळविलें कीं तुमचें कल्याण असो; २६ मी फर्मावितों कीं माझ्या साम्राज्याच्या सर्व हद्दींतील लोकांनीं दानीएलाच्या देवापुढें कंपित होऊन त्याचें भय धरावें; कारण तो जीवंत देव आहे; तो सर्वकाळ अढळ आहे; त्याचें राज्य अविनाशी व त्याचें प्रभुत्व अनंत आहे; २७ ज्यानें दानीएलास सिंहांच्या पंजांतून सोडविलें तोच बचाव करणारा व मुक्तिदाता आहे; तो आकाशांत व पृथ्वीवर चिन्हें व उत्पात घडविणारा आहे.

२८ हा दानीएल दारयावेशाच्या कारकीर्दींत व कोरेश पारसी याच्या कारकीर्दींत भाग्यास चढला.

**७** १ बाबेलाचा राजा बेलशस्सर याच्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षी दानीएल आपल्या पलंगावर पडला असतां त्याला स्वप्न पडलें व त्याच्या डोक्यांत दृष्टांत घोळूं लागले; मग त्यानें तें स्वप्न लिहून काढिलें व त्याचें सार कथन केलें. २ दानीएलानें म्हटलें, मीं

रात्रीं दृष्टांतांत पाहिलें तों चाऱ्ही दिशांचे वारे महा-
सागरावर सुटले; ३ आणि भिन्नभिन्न अशीं चार
मोठालीं श्वापदें समुद्रांतून बाहेर निघालीं. ४ पहिलें
सिंहासारखें असून त्यास गरुडाचे पंख होते; मी पाहत
असतां त्याचे पंख उपटून त्याला जमिनीवरून उचल-
ण्यांत आलें; त्याला मानवाप्रमाणें दोन पायांवर उभें
केलें; त्यास मानवाचें हृदय दिलें. ५ मीं आणखी पाहिलें
कीं दुसरें एक श्वापद अस्वलासारखें होतें; तें एक अंग
वर करून उभें राहिलें; त्यानें आपल्या तोंडांत, आपल्या
दांतांमध्यें तीन फासोळ्या धरिल्या होत्या; लोक त्यास
म्हणाले, ऊठ, पुष्कळ मांस खा. ६ यानंतर मीं पाहिलें
तों आणखी एक श्वापद चित्त्यासारखें दिसलें; त्याच्या
पाठीवर पक्ष्याचे चार पंख होते; त्या श्वापदास चार
शिरेंहि होतीं; त्यास अधिकार दिला होता. ७ यानंतर
मीं रात्रीच्या दृष्टांतांत पाहिलें तों पाहा, एक चौथें
श्वापद विक्राळ, भयानक व अतिशयित बळकट असें
होतें; त्याला मोठाले लोखंडी दांत होते; तें सर्व कांहीं
चावून त्याचा चुरा करी व उरलेलें आपल्या पायांखालीं
तुडवी; तें अगोदरच्या सर्व श्वापदांहून भिन्न होतें;
आणि त्याला दहा शिंगें होतीं. ८ मी तीं शिंगें न्याहा-
ळून पाहत असतां, पाहा, त्यांच्यामध्यें आणखी एक
लहानसें शिंग निघालें; त्याच्यामुळें अगोदरच्या शिंगां-
पैकीं तीन समूळ उपटलीं गेलीं; आणि त्या शिंगाला
मनुष्याच्या डोळ्यांसारखे डोळे होते, व त्याला मोठमोठ्या
गोष्टी बोलणारें तोंड होतें.

९ मी पाहत असतां आसनें मांडण्यांत आलीं आणि एक
पुराणपुरुष आसनारूढ झाला; त्याचा पेहराव बर्फासारखा
पांढरा होता, त्याच्या डोक्याचे केस स्वच्छ लोकरीसारखे
होते; त्याचें आसन प्रत्यक्ष अग्निज्वालामय होतें, व त्या
आसनाचीं चक्रें धगधगीत अग्निरूप होतीं. १० त्याच्यासमो-
रून अग्निप्रवाह वाहत होता; हजारों लोक त्याची सेवा
करीत होते, लाखों लोक त्याच्यासमोर उभे होते; न्यायसभा
भरली; वह्या उघडल्या. ११ त्या समयीं त्या शिंगांतून
निघालेला मोठा शब्द ऐकून मी पाहत असतां त्या
श्वापदाचा वध करण्यांत आला; त्याचें शरीर छिन्नभिन्न
करण्यांत आलें; व तें जळावें म्हणून अग्नींत टाकण्यांत आलें;
एवढें मीं पाहिलें. १२ इतर श्वापदांविषयीं म्हणाल तर
त्यांचा अधिकार हरण करण्यांत आला; तरी कांहीं मुदती-
पर्यंत, कांहीं काळपावेतों त्यांचा प्राण वांचविण्यांत आला.
१३ तेव्हां मीं रात्रीच्या दृष्टांतांत पाहिलें तों आका-
शांतील मेघांवर आरूढ होऊन, मानवपुत्रासारखा
कोणी आला; तो त्या पुराणपुरुषाकडे आला, व त्यास
त्यांनीं त्याच्याजवळ नेलें. १४ सर्व लोक, सर्व राष्ट्रें व सर्व
भाषा बोलणारे लोक, यांनीं त्याची सेवा करावी म्हणून
त्यास प्रभुत्व, वैभव व राज्य हीं दिलीं; त्याचें प्रभुत्व
अक्षय व अढळ आहे; त्याचें राज्य अविनाशी आहे.

१५ मग मज दानीएलाचा जीव माझ्या ठायीं घाबरा
झाला; माझ्या डोक्यांत घोळणाऱ्या दृष्टांतांमुळें मी
चिंताक्रांत झालों. १६ जवळ उभे असलेल्यांपैकीं एका-
कडे मी गेलों व या सर्व गोष्टींचें मर्म त्यास विचारिलें.
तेव्हां त्यानें तें मला कथन केलें व या सर्व गोष्टींचा
अर्थ मला समजावून सांगितला. १७ तीं मोठालीं चार
श्वापदें पृथ्वीवर उदयास येणारे चार राजे होत.
१८ तथापि परात्पर देवाचे जे पवित्र जन त्यांस राज्य
प्राप्त होईल; तें राज्य सर्वकाळ, युगानुयुग, त्यांच्या
ताब्यांत राहील; १९ मग तें चौथें श्वापद, जें इतरांहून
भिन्न असून अतिविक्राळ होतें, ज्याचे दांत लोखंडाचे
व नखें पितळेचीं होतीं, जें सर्व कांहीं चावून त्याचा
चुरा करी व उरलेलें आपल्या पायांखालीं तुडवी, त्याचें
काय तें कळावें म्हणून मीं इच्छा दर्शविली. २० त्याच्या
डोक्याला दहा शिंगें असून आणखी एक शिंग निघालें
त्यामुळें तीन शिंगें उपटून पडलीं; त्या शिंगाला डोळे
व मोठमोठ्या गोष्टी बोलणारें तोंड असून तें आपल्या बरो-
बरच्या इतर शिंगांहून लठ्ठ दिसत होतें; या सगळ्यांचें
मर्म काय तें कळावें म्हणून मीं इच्छा दर्शविली. २१ मीं
पाहिलें तों त्या शिंगानें पवित्र जनांबरोबर युद्ध केलें, व
त्याचें त्यांजवर प्राबल्य झालें. २२ शेवटीं पुराणपुरुष आला
तेव्हां परात्पर देवाच्या पवित्र जनांस न्याय मिळाला आणि
त्या पवित्र जनांस राज्याचें स्वामित्व मिळण्याचा समय
आला; याचेंहि मर्म कळावें म्हणून मीं इच्छा दर्शविली.

२३ त्यानें सांगितलें कीं चौथें श्वापद हें पृथ्वीवर चौथें राज्य होईल; तें इतर राज्यांहून भिन्न होईल; तें सर्व पृथ्वीला ग्रासून टाकील, तिचें तुडवून चूर्ण करील. २४ आतां दहा शिंगांविषयीं विचारशील तर त्या राज्यांतून दहा राजे निघतील व त्यानंतर आणखी एक राजा निघेल; तो त्या पूर्वीच्या राजांहून भिन्न असून तिघां राजांस पादाक्रांत करील. २५ तो परात्पर देवाविरुद्ध गोष्टी बोलेल आणि परात्पर देवाच्या पवित्र जनांस जेर करील; तो नेमिलेल्या सणांत व घालून दिलेल्या शिस्तींत बदल करावयास पाहील; एक काळ, दोन काळ व अर्धा काळपर्यंत ते त्याच्या कबजांत राहतील. २६ पण न्यायसभा भरेल, त्याचें प्रभुत्व काढून घेतील, त्याचा नाश करितील व त्याचा कायमचा नायनाट करितील. २७ राज्य, प्रभुत्व व संपूर्ण आकाशाखालील राज्यांचें वैभव हीं परात्पर देवाची प्रजा जे पवित्र जन यांस देण्यांत येतील; त्याचें राज्य सनातन आहे, सर्व सत्ताधीश त्याची सेवा करितील, त्याचे अंकित होतील.

२८ या गोष्टीचें कथन येथें संपलें. मी दानीएल ह्या कल्पनांनीं व्याकुळ झालों आणि माझी मुद्रा पालटली; तरी मीं हें सर्व आपल्या मनांत ठेविलें.

८ १ मी जो दानीएल त्या मला प्रथम दृष्टांत झाला होता, त्यानंतर बेलशस्सर राजाच्या कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षी मला पुनः दृष्टांत झाला. २ मीं दृष्टांतांत पाहिलें तों मला असें दिसून आलें कीं मी एलाम परगण्यांतल्या शूशन राजवाड्यांत आहें; आणखी मीं दृष्टांतांत पाहिलें तों मी उलई नदीतीरीं आहें. ३ मीं डोळे वर करून पाहिलें तों मला नदीसमोर दोन शिंगांचा एक एडका दिसला; तीं दोन्ही शिंगें मोठालीं होतीं; त्यांतलें एक दुसऱ्याहून मोठें असून मागाहून निघालें होतें. ४ तो एडका पश्चिमेस, उत्तरेस व दक्षिणेस धडका मारीत आहे असें मीं पाहिलें; कोणी पशु त्यासमोर उभा राहीना, व त्याच्या तडाक्यांतून एकाद्यास सोडवावयाचें कोणास सामर्थ्य नव्हतें; तो आपल्या मनास येई तसें करी, असा तो प्रबल झाला. ५ मी विचार करीत होतों तों पाहा, पश्चिमदिशेहून एक बकरा सर्व पृथ्वी आक्रमून आला; येतांना त्यानें जमिनीस पाय लाविला नाहीं; त्या बकऱ्याच्या डोळ्यांच्या मधोमध एक ठळक शिंग होतें. ६ मीं जो दोन शिंगांचा एडका नदीसमोर उभा राहिलेला पाहिला होता त्याकडे तो बकरा गेला; त्यानें आपलें सर्व बळ खर्चून त्वेषानें त्याला धडक मारिली. ७ मीं पाहिलें तों तो त्या एडक्याजवळ गेला, व त्यानें क्रोधानें खवळून त्या एडक्यास धडक मारिली व त्याचीं दोन्ही शिंगें मोडून टाकिलीं; त्याच्यापुढें टिकाव धरण्याची त्या एडक्यास शक्ति नव्हती; त्या बकऱ्यानें त्याला जमिनीवर पाडून तुडविलें; त्या एडक्याला त्याच्या हातांतून सोडविण्याचें कोणाला सामर्थ्य नव्हतें. ८ तो बकरा अति प्रबल झाला; तो बलिष्ठ झाला असतां त्याचें मोठें शिंग मोडलें; आणि त्याच्याऐवजीं त्याला चार बाजूंस चार ठळक शिंगें फुटलीं. ९ त्यांतल्या एका शिंगांतून एक लहान शिंग निघालें; त्याची वृद्धि दक्षिणेस, पूर्वेस व त्या वैभवी देशाकडे पराकाष्ठेची झाली. १० त्याची वृद्धि आकाशगणांपर्यंत होऊन त्या गणांपैकीं व त्या ताऱ्यांपैकीं कांहींना त्यानें जमिनीवर पाडून तुडविलें. ११ एवढेंच नव्हे तर त्या गणांच्या अधिपतीबरोबर तो स्पर्धा करूं लागला; त्याला नित्य होत असलेले यज्ञयाग त्यानें बंद केले, आणि त्याचें पवित्रस्थान पाडून टाकिलें. १२ लोकांच्या पातकांस्तव तें सैन्य नित्याच्या यज्ञयागांसहित त्याच्या स्वाधीन करण्यांत आलें; त्यानें सत्य मातीस मिळविलें; त्यानें आपला मनोरथ सिद्धीस नेला.

१३ तेव्हां मीं एका पवित्र पुरुषास बोलतांना ऐकलें; दुसरा एक पवित्र पुरुष त्या बोलणाऱ्यास म्हणाला, हा नित्याचा यज्ञयाग, विध्वंसमूलक पातक, पवित्रस्थान व सैन्य हीं पायांखालीं तुडविणें ह्या दृष्टांतांत पाहिलेल्या गोष्टी कोठवर चालणार? १४ तो मला म्हणाला, दोन हजार तीनशें दिवस[1]; त्यानंतर पवित्रस्थानाची शुद्धि होईल.

१५ मग असें झालें कीं मीं दानीएलानें हा दृष्टांत पाहिला तेव्हां त्याचा अर्थ काय हें समजण्याचा मी यत्न करूं लागलों तों पाहा, मनुष्यरूपधारी अशा एकास मीं मजसमोर उभें राहिलेलें पाहिलें. १६ उलई नदीच्या

१ मुळांत: सांजसकाळ

दोन तीरांमधून मीं मनुष्यवाणी ऐकली ती अशी:
गब्रीएला, या पुरुषास हा दृष्टांत समजावून सांग.
१७ तेव्हां मी उभा होतों तेथें तो मजजवळ आला; तो
आला तेव्हां मी घाबरून पालथा पडलों; तो मला
म्हणाला, हे मानवपुत्रा, हा दृष्टांत समजून घे; कारण
हा शेवटच्या काळाविषयींचा आहे. १८ तो मजबरोबर
बोलत असतां मी जमिनीवर पालथा पडलों व मला गाढ
निद्रा लागली; पण त्यानें मला स्पर्श करून उभें केलें.

१९ तो म्हणाला, पाहा, कोपाच्या शेवटल्या काळांत
काय होईल हें मी तुला सांगतों; कारण नेमिलेल्या
अंतसमयासंबंधानें हा दृष्टांत आहे. २० दोन शिंगें
असलेला एडका तूं पाहिला; ते मेदय व पारस यांचे
राजे. २१ तो दांडगा बकरा ग्रीसचा राजा; त्याच्या
डोळ्यांच्या मधोमध असलेलें मोठें शिंग हा
पहिला राजा. २२ एक शिंग मोडून त्याच्या
जागीं चार शिंगें निघालीं याचा अर्थ असा कीं
त्या राज्यांतून चार राज्यें उद्भवतील; पण त्यांचें बल
पहिल्या राज्याइतकें राहावयाचें नाहीं. २३ त्या राज्यांचा
शेवट जवळ येऊन पातक्यांच्या पापाचा घडा भरला
म्हणजे उग्रस्वरूपी, कूटप्रश्न समजणारा असा राजा
उभा राहील. २४ त्याची सत्ता बलवत्तर होईल; तथापि
तीं अशी त्याच्या स्वतांच्या पराक्रमानें होणार नाहीं;
तो विलक्षण नाश करील. तो उत्कर्ष पावेल आणि
आपला मनोरथ सिद्धीस नेईल; तो समर्थ व पवित्र
लोकांचा नाश करील. २५ तो आपल्या काव्यानें
आपल्या हातचीं कारस्थानें सिद्धीस नेईल; तो उन्मत्त
होऊन निर्भय असलेल्या पुष्कळ लोकांचा नाश करील;
तो राजराजेश्वराबरोबर विरोध करील; तथापि त्याजवर
कोणाचा हात न पडतां तो नाश पावेल. २६ हा जो
अहोरात्रीचा दृष्टांत सांगितला तो खरा आहे; हा दृष्टांत
गुप्त ठेव, कारण तो दीर्घकाळास लागू आहे.

२७ तेव्हां मज दानीएलाला मूर्च्छा आली व मी
कांहीं दिवस आजारी पडलों; त्यानंतर मी
उठून राजाचें कामकाज करूं लागलों. हा दृष्टांत पाहून
मी विस्मित झालों; पण तो कोणास कळला नाहीं.

१ मेदी वंशांतला अहश्वेरोशाचा पुत्र दारयावेश
९ खास्द्यांच्या देशावर राजा होता त्याच्या कार-
कीर्दीच्या पहिल्या वर्षी, २ मज दानीएलास
शास्त्रग्रंथांवरून समजलें कीं यरुशलेमाच्या ओसाड
दशेचा काल पुरा होण्यास सत्तर वर्षें लागतील,
असें परमेश्वराचें वचन यिर्मया संदेष्ट्याला प्राप्त
झालें होतें. ३ हें जाणून मीं आपलें मुख प्रभु देवाकडे
लावून प्रार्थना, विनवण्या, उपास, गोणताट नेसणें व
अंगावर राख उधळणें हीं चालू केलीं. ४ मीं आपला
देव परमेश्वर याची प्रार्थना करून पापांगीकार केला
तो असा: हे प्रभो, हे थोर व भयावह देवा, जे तुज-
वर प्रेम करितात व तुझ्या आज्ञा पाळितात त्यांजबरो-
बर तूं आपला करार पाळून त्यांजवर दया करितोस;
५ आम्हीं पाप केलें, कुटिलतेनें वागलों, दुष्टतेचें वर्तन
केलें, फितुरी झालों, तुझे विधि व तुझे निर्णय यांपासून
आम्ही परावृत्त झालों, ६ तुझे सेवक जे संदेष्टे त्यांनीं
तुझ्या नामानें आमचे राजे, सरदार, वडील व देशाचे
सर्व लोक यांस सांगितलें तेंहि आम्हीं ऐकलें नाहीं.
७ हे प्रभो, न्यायत्व कायतें तुझ्याच ठायीं आहे,
परंतु आमच्या तोंडाला आजच्याप्रमाणें काळोखी आहे;
यहूदाचे लोक, यरुशलेमनिवासी लोक आणि जवळ व
दूर राहणारे सर्व इस्राएल लोक, यांनीं तुजविरुद्ध पाप
केल्यामुळें तूं त्यांस निरनिराळ्या देशांत हाकून लाविलें,
त्या सगळ्यांच्या तोंडाला काळोखी आहे. ८ हे प्रभो,
आमच्या तोंडांस, आमचे राजे, आमचे सरदार,
आमचे वडील यांच्या तोंडांस काळोखी आहे. कारण
आम्हीं तुजविरुद्ध पाप केलें आहे. ९ आमचा देव
प्रभु दयेचा व क्षमेचा सागर आहे; आम्हीं त्याजबरोबर
फितुरी केली; १० आणि आमचा देव परमेश्वर यानें
आपले सेवक जे संदेष्टे त्यांच्याद्वारें आम्हांपुढें ठेवि-
लेल्या त्याच्या धर्मशास्त्राप्रमाणें वर्तण्यासंबंधानें आम्हीं
त्याची वाणी ऐकली नाहीं. ११ सर्व इस्राएल लोकांनीं
तुझ्या धर्मशास्त्राचें उल्लंघन केलें आहे; त्यांनीं पराङ्मुख
होऊन तुझी वाणी ऐकली नाहीं; म्हणून आम्हांवर

१ मुळांत: यावानाचा. २ मुळांत: सांजसकाळचा.

शापाचा वर्षाव झाला आहे; देवाचा सेवक
मोशे याच्या धर्मशास्त्रांत लिहिलेल्या शपथेप्रमाणें झालें
आहे; कारण आम्हीं त्याजविरुद्ध पाप केलें आहे.
१२ त्यानें आम्हांवर मोठें अरिष्ट आणिलें; जीं वचनें
तो आम्हांविरुद्ध व आमचा न्याय करणाऱ्या न्याया-
धीशांविरुद्ध बोलला तीं त्यानें प्रत्ययास आणून दिलीं
आहेत; यरुशलेमावर जशी विपत्ति आली तशी सर्व
जगावर कधीं आली नाहीं. १३ मोशाच्या धर्मशास्त्रांत
लिहिल्याप्रमाणें ही सर्व विपत्ति आम्हांवर आली आहे;
तरी आपल्या अधर्मांपासून परावृत्त व्हावें व तुझ्या
सत्याचा उमज पडावा म्हणून आम्हीं आमचा
देव परमेश्वर याची काकळूत केली नाहीं; १४ यास्तव
परमेश्वर ही विपत्ति आम्हांवर आणावयास संधि
पाहत आहे; कारण आमचा देव परमेश्वर जीं कांहीं
कृत्यें करितो तीं न्याय्य आहेत, पण आम्हीं त्याची
वाणी ऐकली नाहीं. १५ आतां हे प्रभो, आमच्या
देवा, तूं आपल्या सामर्थ्यवान् हातानें मिसर देशांतून
आपल्या लोकांस बाहेर आणिलें व आजच्याप्रमाणें
आपला महिमा वाढविला. आम्हीं पाप केलें आहे;
आम्हीं दुराचरण केलें आहे. १६ हे प्रभो, आपल्या सर्व
न्यायकृत्यांप्रमाणें यरुशलेम नगरावरील, तुझ्या पवित्र
पर्वतावरील, आपला क्रोध व संताप दूर कर; आमच्या
पातकांमुळें व आमच्या पूर्वजांच्या दुष्कर्मांमुळें यरु-
शलेम व तुझे लोक आसपासच्या सर्वांस निंदेचे विषय
झाले आहेत. १७ यास्तव आतां, हे आमच्या देवा,
आपल्या सेवकाची प्रार्थना व विनवण्या ऐक; तुझ्या
ओसाड पडलेल्या पवित्रस्थानावर आपला मुखप्रकाश
पाड; हे प्रभो, तूं आपल्याप्रीत्यर्थ हें कर. १८ हे
माझ्या देवा, कान दे, ऐक; आपले नेत्र उघडून आमचा
झालेला विध्वंस पाहा व तुझें नाम ज्या नगरास दिलें
आहे तें पाहा; आम्ही आपल्या विनवण्या आमच्या
धार्मिकतेस्तव नव्हे तर तुझ्या विपुल करुणांस्तव तुज-
पुढें मांडितों. १९ हे प्रभू, ऐक; हे प्रभू, क्षमा कर;
हे प्रभू, ऐक, कार्य कर; विलंब लावूं नको; हे माझ्या
देवा, तुझें नगर व तुझे लोक यांस तुझें नाम दिलें
आहे; म्हणून तुझ्याचप्रीत्यर्थ हें मागतों.

२० मी बोलत व प्रार्थना करीत असतां,
माझें पाप व माझे लोक इस्राएल यांचें पाप
कबूल करीत असतां, आणि माझ्या देवाच्या पवित्र
पर्वतासाठीं माझा देव परमेश्वर याजकडे विनवणी
करीत असतां, २१ असे प्रार्थनेचे शब्द मी बोलत
असतां जो पुरुष गब्रीएल, दृष्टांताच्या आरंभीं मी अगदीं
व्याकुळ असतां माझ्या दृष्टीस पडला होता, तो संध्या-
काळच्या यज्ञसमयीं मजसमीप आला. २२ त्यानें
मजबरोबर भाषण करून मला समज दिला. तो म्हणाला,
हे दानीएला, मी तुला बुद्धि देऊन चतुर करण्यासाठीं
आलों आहें. २३ तुझ्या प्रार्थनांस आरंभ होतांच आज्ञा
झाली, ती तुला सांगण्यास मी आलों आहें; कारण तूं
परमप्रिय आहेस; तर या गोष्टीचा विचार कर व हा
दृष्टांत समजून घे.

२४ आज्ञाभंगाची समाप्ति व्हावी, पातकांचा अंत
करावा, अधर्माबद्दल प्रायश्चित्त करावें, सनातन धार्मिकता
उदयास आणावी, दृष्टांत व संदेश मुद्रित करावे आणि जो
परमपवित्र त्याला अभिषेक करावा, हें घडून येण्या-
साठीं तुझे लोक व तुझें पवित्र नगर यांसंबंधानें सत्तर
सप्तकें ठरलीं आहेत. २५ हें कळून येऊं दे व समजून
घे कीं यरुशलेमाचा जीर्णोद्धार करण्याची आज्ञा झाल्या-
पासून अभिषिक्त, अधिपति, असा जो तो येईपर्यंत सात
सप्तकांचा अवकाश आहे; व बासष्ट सप्तकें लोटल्यावर धाम-
धुमीचा काळ असतांहि नगर, रस्ते व खंदक यांसह बांधि-
तील. २६ बासष्ट सप्तकें संपल्यावर अभिषिक्ताचा वध
होईल, व त्याला कांहीं उरणार नाहीं; आणि जो अधिपति
येईल त्याचे लोक नगर व पवित्रस्थान उद्ध्वस्त करितील;
त्याचा अंत पुरानें होईल; युद्ध अंतापर्यंत चालेल; सर्व कांहीं
उजाड होण्याचें ठरलें आहे. २७ तो पुष्कळ लोकांबरोबर
एक सप्तकाचा पक्का करार करील; अर्धे सप्तकपर्यंत तो यज्ञ व
अन्नबलि बंद करील; उद्ध्वस्त करणारा अमंगलांच्या पंखां-

१ मुळांत: मशीहा

२ अथवा: सात सप्तकें व बासष्ट सप्तकें यांचा अव-
काश आहे; धामधुमीचा काल असतांहि

वर आरूढ होऊन येईल व ठरलेल्या समाप्तीपर्यंत उद्‌-
ध्वस्त करणाऱ्यावर कोपाचा वर्षाव होईल.

१ पारसाचा राजा कोरेश याच्या कार-
१० कीर्दीच्या तिसऱ्या वर्षी बेल्टशास्सर हें नांव
मिळालेल्या दानीएलास एक गोष्ट प्रगट झाली;
ती गोष्ट सत्य असून मोठ्या युद्धाविषयींची होती; त्याला
ती गोष्ट समजली; त्या दृष्टांताचें मर्म त्यास कळलें.
२ त्या दिवसांत मी दानीएल सबंध तीन सप्तकें शोक
करीत होतों. ३ तीन सबंध सप्तकें संपत तोपर्यंत मीं
स्वादिष्ट अन्न मुळीं खाल्लें नाहीं, मांस व द्राक्षारस हीं
माझ्या तोंडांत गेलीं नाहींत, आणि मीं तैलाभ्यंगहि केला
नाहीं. ४ पहिल्या महिन्याच्या चोविसाव्या तारखेस
महानदी हिद्देकेल (टायग्रिस) हिच्या तीरीं मी असतां
५ मीं डोळे वर करून पाहिलें तों तागाचीं वस्त्रें परि-
धान केलेला आणि कमरेस उफाज देशच्या शुद्ध सोन्याचा
पट्टा घातलेला असा एक पुरुष माझ्या दृष्टीस पडला.
६ त्याचें शरीर वैडूर्यमण्यासारखें असून त्याचें मुख विद्यु-
ल्लतेसारखें होतें. त्याचे नेत्र पेटलेल्या दीपांसमान होते,
त्याचें हातपाय उज्ज्वल पितळेसारखे होते आणि त्याच्या
शब्दाचा ध्वनि एकाद्या समुदायाच्या गजबजाटासारखा
होता. ७ मी दानीएलानें एकट्यानें तो दृष्टांत पाहिला;
मजबरोबर असलेल्या मनुष्यांनीं तो दृष्टांत पाहिला
नाहीं; तरी त्यांस मोठा कंप सुटला, आणि कोठें तरी
लपावें म्हणून ते पळून गेले. ८ मग मी एकटाच
राहिलों व हा मोठा दृष्टांत पाहिला; माझ्यांत कांहीं
त्राण उरलें नाहीं. मी निस्तेज होऊन मृतप्राय झालों;
मला कांहींच शक्ति राहिली नाहीं. ९ तरी त्याच्या
शब्दांचा ध्वनि माझ्या कानीं पडला; मीं त्याच्या शब्दांचा
ध्वनि ऐकला तेव्हां मी भूमीवर पालथा पडलों व मला
गाढ झोप लागली; १० तों पाहा, एका हातानें मला
स्पर्श केला, त्याच्या योगानें मी गुडघे व तळहात जमि-
नीवर टेकून थरथरत राहिलों.
११ तो मला म्हणाला, हे दानीएला, परमप्रिय पुरुषा,
मी तुला सांगतों ते शब्द समजून घे; नीट उभा राहा;
कारण मला आतां तुजकडे पाठविलें आहे; तो मजबरोबर
असें बोलला तेव्हां मी थरथर कांपत उभा राहिलों. १२
तो मला म्हणाला, दानीएला, भिऊं नको; कारण ज्या
दिवशीं तूं समज घेण्याचा, व आपल्या देवापुढें नम्र
होण्याचा निश्चय केला त्याच दिवशीं तुझे शब्द ऐकण्यांत
आले; त्या तुझ्या शब्दांवरून मी आलों आहें. १३ पार-
साच्या राज्याचा अधिपति एकवीस दिवस मला आडवा
आला; तेव्हां पाहा; मुख्य अधिपतींपैकीं एक मीखाएल
माझ्या साहाय्यास आला; व मी पारसाच्या राजांच्या
जवळ राहिलों. १४ आतां या अंतींच्या दिवसांमध्यें तुझ्या
लोकांचें काय होणार हें तुला कळविण्यास मी आलों आहें;
कारण दृष्टांताची परिपूर्ति होण्यास बराच अवधि आहे.
१५ याप्रमाणें तो हे शब्द मजबरोबर बोलल्यावर
मी जमिनीकडे आपलें तोंड करून गप्प राहिलों; १६
तों पाहा, मानवपुत्रासारख्या एकानें माझ्या ओठांस
स्पर्श केला; तेव्हां मीं आपलें तोंड उघडून जो मज-
समोर उभा होता त्याला म्हटलें, हे माझ्या स्वामी, या
दृष्टांतानें क्लेश प्रावून मी व्याकुळ झालों आहें व माझ्यांत
कांहीं त्राण राहिलें नाहीं. १७ स्वामीमहाराज, मी तर
आपला सेवक, माझ्या स्वामीबरोबर बोलण्याचें सामर्थ्य
मला कोठून? मला तर मुळीं त्राण राहिलें नाहीं;
माझ्यांत दम राहिला नाहीं. १८ तेव्हां मनुष्याप्रमाणें
दिसणाऱ्या एकानें मला स्पर्श करून माझ्यांत त्राण
आणिलें. १९ तो म्हणाला, परमप्रिय मानवा, भिऊं
नको; तुला शांति असो, हिंमत धर, नेट धर. तो मज-
बरोबर बोलला तेव्हां मला शक्ति आली व मी म्हणालों,
माझ्या स्वामी, तूं आतां बोलावें, कारण तूं माझ्यांत
हिंमत आणिली आहे. २० मग तो म्हणाला, मी तुज-
कडे कां आलों हें तुला माहीत आहे काय? आतां मी
पारसाच्या अधिपतीबरोबर लढावयास जातों; मी गेलों
म्हणजे ग्रीसचा[१] अधिपति येईल. २१ सत्यलेखांत जें
लिहिलें आहे तें तुला प्रगट करितों; त्यांजबरोबर सामना
करण्यांत तुमचा अधिपति मीखाएल याशिवाय दुसऱ्या
कोणाचें मला साहाय्य नाहीं. १ दारयावेश
११ मेदी याच्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षी त्याची
मजबुती करण्यास व त्यास शक्ति देण्यास मी
उभा राहिलों.

१ मुळांत : यावानाचा

२ आतां मी तुला खरें काय तें दाखवून देतों. पाहा,
पारस देशांत तीन राजे उत्पन्न होतील; चौथा त्या
सर्वांहून धनवान् होईल; तो आपल्या धनाच्या योगानें
बलाढ्य झाला म्हणजे तो सर्वांस ग्रीसच्या राज्याविरुद्ध
उठवील. ३ आणखी एक प्रबळ राजा उत्पन्न होईल,
तो आपली सत्ता फार गाजवील आणि आपल्या इच्छेस
येईल तसें करील. ४ तो उदयास आला न आला तोंच
त्याचें राज्य मोडून चार दिशांस त्याचे विभाग होतील;
तरी त्याच्या संततीच्या वांट्यास कांहींएक यावयाचें नाहीं,
व त्या राज्याचा विस्तार पूर्वीप्रमाणें राहणार नाहीं; कारण
त्याच्या राज्याचें उत्पाटन करून तें त्याच्या संततीस
वगळून इतरांस देण्यांत येईल.

५ दक्षिणेचा राजा बलवान् होईल आणि त्याचा एक
सरदार त्याच्याहूनहि बलाढ्य होऊन त्यास राज्य
प्राप्त होईल; त्याचें राज्य मोठें होईल. ६ नेमिलेल्या
वर्षांची मुदत भरल्यावर त्यांचा आपसांत मिलाफ होईल;
दक्षिणेच्या राजाची कन्या उत्तरेच्या राजाकडे करारमदार
करण्यास जाईल; तथापि तिचें बाहुबल कायम राहणार
नाहीं, आणि तो व त्याचें बाहुबलहि टिकणार नाहीं; तर
त्या स्त्रीस ज्यांनीं आणिलें, ज्यानें तिला जन्म दिला व ज्यानें
त्या काळांत तिला बल पुरविलें त्यांसह ती परवश होईल.
७ तरी तिच्या कुळांतला एक अंकुर त्याच्या पदावर
विराजमान होईल; तो सैन्यासहवर्तमान उत्तरेच्या राजा-
च्या गडांत प्रवेश करील आणि त्यांबरोबर संग्राम करून
यशस्वी होईल. ८ तो त्यांचीं दैवतें, ओतींव मूर्ति, आणि
त्यांचीं सोन्यारुप्याचीं सुंदर भांडीं लुटून मिसर देशांत
नेईल; तो उत्तरेच्या राजावर चढाई न करतां कांहीं वर्षें
राहील. ९ तो दक्षिणेच्या राजाच्या मुलखांत जाईल
आणि तेथून स्वदेशीं परतेल.

१० तरी त्याचे पुत्र लढाई करितील; मोठें लष्कर
जमा करितील; ते येऊन तो देश पादाक्रांत करून
पार जातील; ते पुनः परत येऊन लढाई चालवून
त्याच्या गडापर्यंत जाऊन धडकतील. ११ तेव्हां दक्षिणेच्या
राजाचें पित्त खवळून तो बाहेर पडून उत्तरेच्या
राजाबरोबर युद्ध करील; तो पुष्कळ लोकसमूह घेऊन
निघेल, पण तो समूह त्याच्या हातीं लागेल. १२ लष्कर जस-
जसें पुढें चाल करील तसतसें त्याचें मन उन्मत्त होईल; तो
लाखों लोकांस चीत करील तरी तो यशस्वी होणार नाहीं.
१३ तेव्हां उत्तरेचा राजा पुनः येईल, तो आपल्या-
बरोबर पूर्वीपेक्षां मोठें लष्कर घेऊन येईल; हा असा कांहीं
वर्षांचा काळ संपल्यावर तो मोठें सैन्य व बहुत धन
घेऊन येईल. १४ त्या समयीं दक्षिणेच्या राजाविरुद्ध
पुष्कळ लोक उठतील; दृष्टांत प्रत्ययास आणावा म्हणून
तुझ्या लोकांपैकीं धाडदांड लोक उठतील, पण ते
पडतील. १५ अशा प्रकारें उत्तरेचा राजा येईल, तो
मोर्चे लावून तटबंदीचें नगर घेईल; तेव्हां दक्षिणेचें
बाहुबल टिकणार नाहीं; त्याच्या मोठमोठ्या वीरांचें
कांहीं चालणार नाहीं; त्यांच्यांत सामना करण्याचें कांहीं
त्राण उरणार नाहीं. १६ त्याजवर चढाई करणारा
आपल्या इच्छेस येईल तसें करील व त्याजसमोर कोणी
टिकाव धरणार नाहीं; तो आपल्या हातीं प्रत्यक्ष नाश
घेऊन त्या वैभवी देशांत उभा राहील. १७ तो आपल्या
साऱ्या राज्याच्या बलासह येईल; तरी तो त्याजबरोबर
करारमदार करील; तो त्यास स्त्रियांची कन्या भ्रष्ट
करण्यास देईल; ती त्याच्या पक्षाला टिकून राहणार
नाहीं, ती त्याची होणार नाही. १८ नंतर तो आपला
मोर्चा द्वीपांकडे फिरवील, व त्यांतलीं अनेक हस्तगत
करील; पण त्यानें लाविलेला हा कालिमा एक सरदार
नाहींसा करील, एवढेंच नव्हे, तर तो उलट त्यालाच
कालिमा लावील. १९ मग तो आपल्या देशांतील
दुर्गांकडे आपला मोर्चा फिरवील; पण तो ठोकर खाऊन
पडेल व त्याचा पत्ता लागणार नाहीं.

२० पुढें त्याच्या जागीं एक जण उभा राहील, तो
त्या वैभवी देशांत कर वसूल करणाऱ्यास पाठवील;
पण थोड्याच दिवसांत त्याचा नाश होईल; तरी तो
क्रोधानें किंवा युद्धानें होणार नाहीं. २१ मग त्याच्या
जागीं, त्यांनीं राजपदाचा मान न दिलेला असा
एक हलका मनुष्य उदयास येईल; पण तो लोक निर्धास्त
असतां येईल व आर्जवी भाषणें करून राज्य मिळवील.
२२ त्या लोकांचें बळ त्याच्यापुढून पुरासारखें ओसरून

१ **मुळांत :** यावानाच्या

आऊन त्याचा नाश होईल; करार केलेल्या सरदाराचाहि
नाश होईल. २३ त्याजबरोबर करार केल्यावर तो दग्यानें
वागेल; तो चढाई करून येईल व थोड्याशा लोकांच्या
मदतीनें बलाढ्य होईल. २४ लोक निर्धास्त असतां तो
प्रांतांतल्या सुपीक स्थलांवर चालून येईल आणि त्याच्या
वडिलांनीं व त्या वडिलांच्या वडिलांनींहि केलें नाहीं तें
तो करील; तो लुटीचें धन लोकांस वांटून देईल; कांहीं
काळपर्यंत मजबूत किल्ले घेण्याची तो मसलत करील. २५
मोठी फौज घेऊन दक्षिणेच्या राजावर चालून जाण्याचा
हिय्या व बल हीं तो उत्तेजित करील; दक्षिणेचा राजा
फार मोठी व पराक्रमी फौज घेऊन त्याजबरोबर युद्ध
करील, पण त्याचा निभाव लागणार नाहीं, कारण लोक
त्याच्याविरुद्ध मसलती करितील. २६ त्याचें अन्न खाणारे
त्याचा नाश करितील; त्याची सेना पुरासारखी लोटेल,
पण पुष्कळ मरून पडतील. २७ दोन्ही राजांचीं मनें
दुष्कृत्यें करण्याकडे वळतील; ते एका मेजावर बसून पर-
स्परांबरोबर खोटें बोलतील; पण त्यांतून कांहीं निष्पन्न
होणार नाहीं; कारण शेवट व्हावयाचा तो नेमिलेल्या
वेळींच होणार.

२८ मग तो मोठी लूट घेऊन स्वदेशीं
परत जाईल; त्याचें मन पवित्र कराराविरुद्ध होईल;
आणि तो आपला मनोरथ पूर्ण करून स्वदेशीं परत
जाईल. २९ नेमिलेल्या वेळीं तो पुन: दक्षिणेस जाईल;
तरी पूर्वीप्रमाणें आतां त्याचें चालणार नाहीं. ३० कारण
कित्तिमाचीं जहाजें त्याजवर चाल करून येतील, म्हणून
तो खिन्न होऊन मागें फिरेल आणि पवित्र करारावर
रुष्ट होऊन आपल्या मनास वाटेल तसें करील; तो परत
जाईल व पवित्र करार सोडणाऱ्याबरोबर स्नेह करूं
पाहील. ३१ त्याच्या पक्षाचे सैनिक उठावणी करितील; तें
पवित्रस्थान, तो दुर्ग, ते भ्रष्ट करितील, नित्याचें बलि-
हवन ते बंद करितील, आणि विध्वंसमूलक अमंगलाची
ते स्थापना करितील. ३२ जे करारासंबंधानें दुष्ट वर्तन
करितात त्यांस तो फुसलावून भ्रष्ट करील; पण जे लोक
आपल्या देवास ओळखितात ते बलवान् होऊन थोर
कृत्यें करितील. ३३ लोकांतले जे सुज्ञ पुरुष ते
पुष्कळांस बोध करितील; परंतु ते बरेच दिवस तरवार,
अग्नि, बंदिवास व लुटालूट यांनीं संकटांत पडतील.
३४ ते असे संकटांत पडतील तेव्हां त्यास थोडीबहुत
मदत होईल; पण पुष्कळ लोक त्यांजबरोबर गोड बोलून
त्यांना मिळतील. ३५ सुज्ञ पुरुषांपैकीं कोणी संकटांत
पडतील, ते अशासाठीं कीं त्यांनीं कसोटीस लागून
अंतसमयासाठीं शुद्ध व शुभ्र व्हावें; कारण नेमिलेला
अंतसमय प्राप्त होण्यास अद्यापि अवधि आहे.

३६ तो राजा मनास येईल तसें वर्तेल; तो उन्मत्त होईल;
सर्व दैवतांहून तो आपणास श्रेष्ठ समजेल आणि देवाधि-
देवाविरुद्ध विलक्षण उद्धटपणाच्या गोष्टी बोलेल;
कोपाची पूर्तता होईपर्यंत त्याची चलती राहील; जें
नेमिलें आहे तें घडेलच. ३७ तो आपल्या पूर्वजांच्या
दैवतांची, स्त्रियांच्या प्रेमाची किंवा कोणाहि दैवताची
पर्वा करणार नाहीं; कारण तो आपणास सर्वांहून श्रेष्ठ
समजेल. ३८ आपल्या स्थानीं राहून तो दुर्गदैवतास
पूज्य मानील; जें दैवत त्याच्या पूर्वजांस माहीत
नव्हतें त्याची तो सोनें, रुपें, जवाहीर व मनोरम वस्तु
यांनीं पूजा करील. ३९ एका परकीय दैवताच्या साहाय्यानें
तो मोठे मजबूत गड लढेल; जे कोणी त्याला मानितील
त्यांना तो वैभवास चढवील; त्यास पुष्कळ लोकांवर सत्ता
देईल व मोल घेऊन जमीन वांटून देईल.

४० अंतसमयीं दक्षिणेचा राजा त्याला
टक्कर देईल; उत्तरेचा राजा रथ, स्वार व पुष्कळ
तारवें घेऊन वावटळीसारखा त्याजवर येईल; तो
अनेक देशांत शिरेल व त्यांस पादाक्रांत करून पार
निघून जाईल. ४१ तो वैभवी देशांतहि शिरेल;
पुष्कळ देश पादाक्रांत होतील, पण अदोम, मवाब व
अम्मोन एथील निवडक लोक हे त्याच्या हातांतून सुट-
तील. ४२ अशा प्रकारें त्या देशांवर तो आपला हात
चालवील; मिसर देशहि त्याच्या हातून सुटणार नाहीं.
४३ तो मिसर देशांतील सोन्यारुप्याचे निधि व सर्व
मोलवान् वस्तु कबजांत घेईल; लूबी व कुशी हेहि त्याच्या
मागून चालतील; ४४ पण पूर्वेकडल्या व उत्तरेकडल्या
बातम्यांनीं तो चिंताक्रांत होईल; तेव्हां मोठ्या संता-

धानें पुष्कळांचा नाश व उच्छेद करण्यास तो निघून
जाईल. ४५ समुद्राच्या व शोभिवंत पवित्र पर्वतांच्या
दरम्यान तो आपले दरबारी तंबू ठोकील, पण
त्याचा अंत येईल; कोणी त्यास साहाय्य करणार नाहीं.

१ त्या समयीं तुझ्या लोकांचा कैवार
१२ घेणारा मोठा अधिपति जो मीखाएल तो उठेल;
कोणतेंहि राष्ट्र निर्माण झाल्यापासून कधींहि
आलें नाहीं असें संकट त्या समयीं येईल;
तुझ्या लोकांपैकीं ज्यांचीं नांवें वहींत लिहिलेलीं
आढळतील ते सर्व त्या वेळीं मुक्त होतील. २ भूमीं-
तील मातींत निजलेल्यांचा मोठा समुदाय उठेल;
कित्येक सर्वकाळचें जीवन मिळविण्यास आणि कित्येक
अप्रतिष्ठा व सर्वकाळचा धिक्कार मिळविण्यास उठतील.
३ जे सुज्ञ असतील ते अंतराळींच्या प्रकाशासारखे
झळकतील; पुष्कळ लोकांस धार्मिकतेकडे वळविणारे
लोक युगानुयुग ताऱ्यांप्रमाणें चमकतील. ४ हे दानीएला,
तूं अंतसमयापर्यंत हीं वचनें गुप्त ठेव व हें
पुस्तक मुद्रित करून ठेव; पुष्कळ लोक धुंडाळीत
फिरतील; व ज्ञानवृद्धि होईल.

५ मग मीं दानीएलानें पाहिलें तों दुसरे दोन पुरुष,
एक नदीच्या या तीरास व दुसरा त्या तीरास असे
उभे होते. ६ तेव्हां तागाचीं वस्त्रें ल्यालेला जो पुरुष त्या
नदीच्या पाण्यावर होता, त्यास त्यांतल्या एकानें
विचारिलें, या अद्भुत गोष्टींची समाप्ति होण्यास किती
अवधि आहे? ७ तागाचीं वस्त्रें ल्यालेला जो पुरुष
नदीच्या पाण्यावर होता त्यानें आपला उजवा व डावा
हात आकाशाकडे वर करून, जो सदाजीवी त्याची
शपथ वाहून म्हटलें कीं, एक समय, दोन समय व
अर्धा समय एवढा अवधि आहे; पवित्र प्रजेच्या बलाचा
चुराडा करण्याचें संपेल तेव्हां त्या सर्व गोष्टी पुऱ्या
होतील; हें त्याचें म्हणणें माझ्या कानीं पडलें. ८ मीं
हें ऐकलें पण समजलों नाहीं; तेव्हां मी म्हणालों, हे
माझ्या स्वामी, या गोष्टींचा परिणाम काय? ९ तो
म्हणाला, हे दानीएला, तूं आपला स्वस्थ राहा; कारण
अंतसमयापर्यंत हीं वचनें गुप्त ठेवून तीं मुद्रित केलीं
आहेत. १० पुष्कळ लोक आपणांस शुद्ध व शुभ्र
करितील; ते स्वच्छ होतील; पण दुर्जन दुर्वर्तन
करितील; दुर्जनांपैकीं कोणाला समज मिळणार नाहीं;
पण जे सुज्ञ आहेत त्यांस तो प्राप्त होईल. ११ नित्याचें
बलिहवन बंद होईल व विध्वंसमूलक अमंगलाची
स्थापना होईल. तेव्हांपासून एक हजार दोनशें नव्वद
दिवस लोटतील. १२ जो धीर धरून तेराशें पस्तीस
दिवसांची अखेर पाहील तो धन्य. १३ तथापि अंता-
पर्यंत तूं जाऊन स्वस्थ राहा; म्हणजे तुला आराम
मिळेल आणि तूं युगाच्या समाप्तीस आपलें वतन
प्राप्त करून घेण्यास उठशील.

# होशेय



१ यहूदाचे राजे उज्जीया, योथाम, आहाज व
१ हिज्कीया, आणि इस्राएली राजा योवाशाचा पुत्र
यराबाम यांच्या कारकीर्दीत बैरीचा पुत्र होशेय
याला परमेश्वराचें वचन प्राप्त झालें तें हें:
२ परमेश्वर होशेयाबरोबर प्रथम बोलला तेव्हां तो
त्याला म्हणाला, जा; एक जारिणी बायको करून घे व
जारकर्माचीं मुलें आपलीं अशीं करून घे; कारण परमे-
श्वराचा त्याग करणें हें घोर जारकर्म हा देश करीत
आहे. ३ मग त्यानें जाऊन दिब्लाइमाची कन्या गोमर ही
बायको करून घेतली; ती त्याच्यापासून गर्भवती होऊन

तिला पुत्र झाला. ४ तेव्हां परमेश्वरानें त्याला म्हटलें,
याचें नांव इज्रेल ठेव; कारण थोडा काळ लोटल्यावर
मी इज्रेल येथील रक्तपाताचा सूड येहूच्या राजघराण्यावर
उगवीन व इस्राएल घराण्याच्या राज्याचा अंत करीन.
५ त्या दिवशीं असें होईल कीं इज्रेल खोऱ्यांत इस्रा-
एलाच्या धनुष्याचा मी भंग करीन. ६ यानंतर ती पुनः
गर्भवती होऊन तिला कन्या झाली. तेव्हां परमेश्वर त्याला
म्हणाला, हिचें नांव लो-रुहामा ( दया न पावलेली )
ठेव; कारण इस्राएल घराण्याला क्षमा करण्याइतकी
दया मी त्यांजवर पुनः करणार नाहीं. ७ यहूदाच्या
घराण्यावर मी दया करीन; त्यांचा देव परमेश्वर
याच्या हातून त्यांचा उद्धार करीन; धनुष्य, तरवार,
लढाई, घोडे अथवा स्वार यांच्या द्वारें हा उद्धार
करणार नाहीं. ८ लो-रुहामेचें दूध तोडल्यावर गोमर
गर्भवती होऊन तिला पुत्र झाला. ९ तेव्हां परमेश्वर
म्हणाला, याचें नांव लो-अम्मी ( माझे लोक नव्हत )
ठेव; कारण तुम्ही माझे लोक नव्हां व मी तुमचा नव्हें.

१० तथापि इस्राएलाची संतति समुद्राच्या वाळू-
सारखी संख्येनें अपरिमित व अगण्य होईल आणि
असें घडून येईल कीं तुम्ही माझे लोक नव्हां असें जेथें
त्यांस म्हणत, तेथें तुम्ही जीवंत देवाचे पुत्र आहां, असें
त्यांस म्हणतील. ११ यहूदाची संतति व इस्राएलाची
संतति एकत्र होऊन आपणांवर एक प्रमुख नेमितील
व देशांतून निघून येतील; कारण इज्रेलचा दिवस
थोर होईल. १ आपल्या बंधूंस अम्मी ( माझे
२ लोक ), आपल्या भगिनींस रुहामा ( दया
पावलेल्या ) म्हणा.

२ तुम्ही आपल्या आईची चांगली कानउघाडणी
करा, तिचे कान चांगले उघडा; कारण ती माझी पत्नी
नव्हे व मी तिचा पति नव्हें; ती आपले शिंदळचाळे
आपल्या मुखावरून, व्यभिचाराचे प्रकार आपल्या
स्तनांवरून दूर करो; ३ नाहींतर मी तिला
वस्त्ररहित करून ती जन्मकाळीं होती तशी तिला नग्न
ठेवीन, तिला वैराणासारखी करीन, तिला निर्जल
भूमीसारखी ठेवीन, तिला तहानेनें ठार मारीन;
४ तिच्या मुलांबाळांवरहि मी दया करणार नाहीं,
कारण तीं मुलें जारकर्माचीं आहेत. ५ त्यांच्या
आईनें जारकर्म केलें आहे, त्यांचें गर्भधारण करणारीनें
निर्लज्जपणाचे प्रकार केले आहेत; ती म्हणाली, मला
अन्न, पाणी, लोकर, ताग, तेल व पेयें पुरविणाऱ्या
माझ्या वल्लभांमागें मी लागेन. ६ यास्तव पाहा, मी
तुझ्या मार्गावर कांटेरी कुंपण घालीन; तिला वाट
सांपडणार नाहीं अशी आडभिंत तिच्यापुढें घालीन.
७ ती आपल्या वल्लभांमागें धावेल पण ते तिला
आटोपणार नाहींत; ती त्यांचा शोध करील पण ते
तिला सांपडणार नाहींत; तेव्हां ती म्हणेल, मी
आपल्या पहिल्या पतीकडे परत जाईन, कारण तेव्हांची
माझी स्थिति आतांच्यापेक्षां बरी होती.

८ तिला धान्य, द्राक्षारस व तेल पुरविणारा व जें
सोनेंरुपें त्यांनीं बालमूर्तीसाठीं वेचिलें त्याची रेलचेल
करून देणारा तो मीच, हें तिला माहीत नाहीं; ९ म्हणून
पिकाच्या वेळीं माझें धान्य व हंगामाच्या वेळीं माझा
द्राक्षारस मी अटकावून ठेवीन, व तिची नग्नता
झाकण्यासाठीं तिला दिलेली माझी लोकर व माझा ताग
हिरावून घेईन. १० आतां तिच्या वल्लभांसमक्ष
तिची लाज उघडी करीन व माझ्या हातून कोणी तिला
सोडविणार नाहीं. ११ तिचा सर्व उत्सव, तिच्या यात्रा,
तिचीं चंद्रदर्शनें, तिचे शब्बाथ व तिचे सर्व नेमिलेले
सण हीं मी बंद करीन. १२ ज्या आपल्या द्राक्षालतां-
विषयीं व अंजिराच्या झाडांविषयीं ती म्हणत असे कीं
हीं माझ्या वल्लभांनीं दिलेलें माझें वेतन होत, तीं मी
उद्ध्वस्त करीन; मी त्यांचें रान बनवीन, आणि तीं
वनपशु खाऊन टाकितील. १३ बालमूर्तींच्या काळीं ती
त्यांपुढें धूप जाळीत असे, ती नथ व अलंकार यांनीं
नटून आपल्या वल्लभांच्या मागें जात असे; ती
मला विसरली, त्या काळचें प्रतिफळ मी तिला देईन,
असें परमेश्वर म्हणतो.

१४ यास्तव मी तिला मोह पाडून रानांत आणीन,
तिच्या मनाला धीर येईल असें बोलेन. १५ तेथून
मी तिचे द्राक्षीचे मळे तिला देईन; आखोरचें द्वार म्हणजे

म्हणून मी तिला अखोरें खिंड देईन; ती आपल्या
तारुण्याच्या दिवसांतल्याप्रमाणें, ती मिसर देशांतून
निघून आली त्या दिवसांतल्याप्रमाणें, माझें बोलणें त्या
ठिकाणीं ऐकेल. १६ परमेश्वर म्हणतो, त्या दिवशीं असें
होईल कीं तूं मला इशी (माझा पति) म्हणशील,
यापुढें कधीं मला बाली (माझा धनी) म्हणणार नाहींस.
१७ कारण मी तिच्या मुखांतून बालमूर्तींचीं नांवें काढून
टाकीन; यापुढें तिला त्यांच्या नांवांची आठवण
उरणार नाहीं. १८ त्या दिवशीं इस्राएलांकरितां मी
वनपशु, आकाशांतील पक्षी व भूमीवर रांगणारे जीव
यांबरोबर करार करीन; देशांतून धनुष्य, तरवार व युद्ध
हीं मोडून टाकीन व ते सुखासमाधानानें राहतील असें
मी करीन. १९ मी तुला सर्वकाळची आपली वाग्दत्त असें
करीन, धर्मानें व न्यायानें, व ममतेनें व दयेनें मी तुला
आपली वाग्दत्त असें करीन. २० मी तुला निष्ठापूर्वक
वाग्दत्त करीन व तूं परमेश्वराला ओळखशील.

२१ परमेश्वर म्हणतो, त्या दिवशीं असें होईल कीं
मी ऐकेन, मी आकाशाचें ऐकेन, आणि आकाश पृथ्वीचें
ऐकेल; २२ पृथ्वी, धान्य, द्राक्षारस व तेल यांचें ऐकेल
व तीं इज्रेलाचें ऐकतील. २३ मी तिला आपणासाठीं
देशांत पेरीन; मी लो-रुहामेवर (दया न पावलेलीवर)
दया करीन व लो-अम्मी (माझे लोक नव्हत) यांस तूं
अम्मी (माझे लोक) आहेस असें म्हणेन व तूं माझा
देव आहेस असें ते मला म्हणतील.

३ १ मग परमेश्वरानें मला म्हटलें, इस्राएल लोक
अन्य देवांकडे वळतात व मनुकांच्या ढेपांची
आवड धरितात, तरी त्यांच्यावर परमेश्वर प्रेम
ठेवितो; त्याप्रमाणें तूं पुनः जाऊन जी स्त्री जारिणी
असून आपल्या सख्याला प्रिय आहे तिजवर प्रेम
कर. २ मग मीं पंधरा रुपये व दीड मण जव देऊन
तिला आपल्यासाठीं विकत घेतलें. ३ मी तिला
म्हणालों, तूं पुष्कळ दिवस माझ्याकरितां स्वस्थ बसून

१ म्हणजे ताप देणारी (यहोशवा ७:२६ पाहा).

२ म्हणजे देव पेरितो.

राहा, जारकर्म करूं नको, परपुरुषाची होऊं नको; मीहि
तुजशीं असाच वागेन. ४ कारण पुष्कळ दिवसपर्यंत इस्राएल
लोक राजा, सरदार, यज्ञ, पूजास्तंभ, एफोद व तेराफीम
यांवांचून बसून राहतील. ५ नंतर इस्राएल लोक परततील
आणि आपला देव परमेश्वर व आपला राजा दावीद
यांला शरण येतील; ते कालांतीं भीतीनें कंपित होऊन
परमेश्वराचा व त्याच्या चांगुलपणाचा आश्रय करितील.

४ १ इस्राएल लोकहो, परमेश्वराचें वचन ऐका;
कारण देशांतून सत्य, दया व देवज्ञान हीं नाहींतशीं
झाल्यामुळें परमेश्वर या देशाच्या रहिवाश्यांबरोबर
वाद करीत आहे. २ शपथ वाहून ती मोडणें,
मनुष्यवध करणें, चोरी करणें, व्यभिचार करणें यांस
ऊत आला आहे; रक्तपातामागून रक्तपात होत आहेत;
३ त्यामुळें देश शोक करीत आहे व त्यांतील सर्व रहिवासी
व त्यांच्याबरोबर वनपशु व आकाशांतील पक्षी, म्लान
झाले आहेत; समुद्रांतले मासेहि नाहींतसे झाले आहेत.

४ तरी कोणीं विवाद करूं नये, कोणीं कोणाचा
दोष काढूं नये, कारण तुझे लोक याजकाबरोबर वाद
घालणाऱ्यांसारखे आहेत. ५ तूं दिवसां ठेच खाशील,
रात्रीं तुझ्यासह संदेष्टाहि ठेच खाईल; आणि मी तुझ्या
आईचा नाश करीन. ६ ज्ञानाच्या अभावीं माझ्या लोकांचा
नाश झाला आहे. तूं ज्ञानाचा अव्हेर केला म्हणून मीहि
तुझा अव्हेर करीन; म्हणजे अर्थात् मी याजकाचें काम
तुला करूं देणार नाहीं; तूं आपल्या देवाचें धर्मशास्त्र
विसरलास म्हणून मीहि तुझ्या मुलांस विसरेन.

७ जसजशी यांची संख्या वाढत गेली तसतसे
ते मजविरुद्ध पाप करीत गेले; मी त्यांचें वैभव पाल-
टून त्यांची अप्रतिष्ठा करीन. ८ ते माझ्या लोकांच्या
पापावर पोसत आहेत, त्यांच्या अधर्माकडे त्यांचें
चित्त लागलें आहे. ९ जसा याजक तसे लोक असें

१ गृहदेवता अथवा कुलदेवता

२ पाठभेद : ते आपल्या वैभवाला मुकून अप्रतिष्ठा
पावले आहेत.

होईल; त्यांच्या आचरणाबद्दल मी त्यांस शासन करीन,
त्यांच्या कर्मांचें प्रतिफळ त्यांस देईन. १० ते खातील
पण त्यांची तृप्ति व्हावयाची नाहीं; ते व्यभिचार
करितील व त्यांची वाढ होणार नाहीं, कारण त्यांनीं
परमेश्वराकडे चित्त लावण्याचें सोडून दिलें आहे.

११ जारकर्म, द्राक्षारस व नवा द्राक्षारस हीं त्यांचा
विवेक नष्ट करितात. १२ माझे लोक आपल्या
लाकडाच्या ठोकळ्याला प्रश्न विचारितात; त्यांची काठी
त्यांस शकुन सांगते; कारण अनाचारबुद्धीनें त्यांस
बहकविलें आहे, परमेश्वराचा त्याग करणें हा अना-
चार त्यांनीं केला आहे. १३ ते पर्वतांच्या माथ्यांवर
यज्ञयाग करितात व टेकड्यांवर ओक, हिवर व एला
या झाडांची छाया चांगली असल्यामुळें त्यांखालीं
धूप जाळितात; म्हणून तुमच्या कन्या व्यभिचार करि-
तात व तुमच्या सुना जारकर्म करितात. १४ तुमच्या
कन्या व्यभिचार करितात व तुमच्या सुना जारकर्म
करितात त्याबद्दल त्यांस मी शासन करणार नाहीं;
कारण ते स्वतः वेश्यांकडे जातात व कसबिणींसह
यज्ञ करितात; यास्तव हे ज्ञानशून्य लोक नाश पावत
आहेत.

१५ हे इस्राएला, तूं जरी जारकर्म केलें आहे
तरी यहूदानें अशा पापांत पडूं नये; गिल्गालास येऊं
नका, व बेथ-आवेनास जाऊं नका, परमेश्वराच्या
जीविताची शपथ वाहूं नका. १६ कारण इस्राएल हट्टी
कालवडीसारखा हट्ट करीत आहे; आतां परमेश्वर
विस्तीर्ण कुरणांत कोकराप्रमाणें त्यांस चारील. १७ एफ्रा-
ईम मूर्तींवर आसक्त झाला आहे, त्याचें नांव सोडून द्या.
१८ त्यांचा पानोत्सव आटोपल्यावर ते व्यभिचारांत
मग्न होतात; त्यांच्या सरदारांस अप्रतिष्ठा अति प्रिय
आहे. १९ वाऱ्यानें त्यांला आपल्या पंखांत लपेटून
टाकिलें आहे; ते आपल्या यज्ञयागास्तव लज्जित
होतील.

१ याजकांनो, ऐका; हे इस्राएलाच्या घराण्या,
५ लक्ष दे; हे राजघराण्या, कान दे; कारण तुम्हांस शासन
होणार; तुम्ही मिस्पा एथें पाश, ताबोरावर पसरलेलें
जाळें असे झालां आहां. २ फितुरी लोक भ्रष्टाचारांत बुडून
गेले आहेत; तर त्या सर्वांस शासन करणारा मी आहें.
३ एफ्राइमाला मी ओळखतों, इस्राएल मजपासून लपलेला
नाहीं; हे एफ्राइमा, तूं व्यभिचार केला आहे; इस्राएल
भ्रष्ट झाला आहे.

४ त्यांचीं कर्में त्यांला आपल्या देवाकडे वळूं देत
नाहींत, कारण अनाचारबुद्धि त्यांच्या ठायीं आहे,
परमेश्वराला ते ओळखीत नाहींत. ५ इस्राएलाचें जो
भूषण तो त्याच्यासमक्ष त्याच्याविरुद्ध साक्ष देतो,
म्हणून इस्राएल व एफ्राईम आपल्या पापामुळें अडखळून
पडतील, यहूदाहि त्यांच्याबरोबर अडखळून पडेल. ६ ते
आपलीं मेंढरें व गुरें घेऊन परमेश्वराचा आश्रय कर-
ण्यास येतील, पण तो त्यांस सांपडणार नाहीं, तो त्यांस
अंतरला आहे. ७ ते परमेश्वराबरोबर बेइमान झाले
आहेत, कारण त्यांस झालेलीं मुलें परकी आहेत; आतां
चंद्रदर्शन होतांच ते आपल्या वतनभागांसह गडप होतील.

८ गिबांत शिंग फुंका, रामांत करणा वाजवा;
तुझ्यामागें हे बन्यामिना ! असा रणशब्द बेथ-आवेन
येथें करा. ९ शासनाच्या दिवशीं एफ्राईम ओसाड
होईल; ही खात्रीनें होणारी गोष्ट मीं इस्राएलाच्या वंशांस
कळविली आहे. १० यहूदाचे सरदार शेताची मेर
सारणाऱ्यांसारखे झाले आहेत; मी त्यांजवर पाण्याप्रमाणें
आपल्या क्रोधाचा वर्षाव करीन. ११ एफ्राइमाला पीडा
झाली आहे, त्याच्या हक्काची पायमल्ली झाली आहे; कारण
तो स्वेच्छेनें शून्याच्या मागें लागला; १२ यास्तव मी एफ्रा-
इमास कसरीसारखा व यहूदाच्या घराण्यास किडीसारखा
झालों आहें. १३ एफ्राइमानें आपला रोग पाहिला
व यहूदानें आपली जखम पाहिली तेव्हां एफ्राईम
अश्शुराकडे गेला व यारेब राजास त्यानें निरोप पाठविला;
पण त्याला तुम्हांस बरें करितां येणार नाहीं, तुमची
जखम बरी करितां येणार नाहीं. १४ कारण मी एफ्रा-
इमास सिंहासारखा व यहूदाच्या घराण्यास तरुण
सिंहासारखा होईन; मी फाडून टाकीन आणि
परत जाईन, तो मीच; मी त्यास घेऊन जाईन, आणि
सोडविणारा कोणी असणार नाहीं.

१५ ते आपल्या दोषाचें फळ भोगून माझ्या दर्शना-

१ मुळांत : ढालींस

विषयीं उत्सुक होत तोंवर मी आपल्या स्थानीं
जाऊन राहीन; ते आपल्या संकटसमयीं माझा धावा
कळकळीनें करून म्हणतील : १ चला, आपण परमे-
६ श्वराकडे परत जाऊं; कारण त्यानें आम्हांस फाडिलें
आहे, व तोच आम्हांस बरें करील; त्यानें आम्हांस
जखम केली आहे, व तोच पट्टी बांधील. २ तो
दोन दिवसांत आमचें पुनरुज्जीवन करील; तिसऱ्या
दिवशीं तो आम्हांस उठवून उभे करील; आणि त्याज-
समोर आम्ही जीवंत राहूं. ३ चला, आपण परमेश्वरास
ओळखूं; परमेश्वराचें ज्ञान मिळविण्यास झटूं; त्याचा
उदय अरुणोदयाप्रमाणें निश्चित आहे; तो पर्जन्या-
प्रमाणें, भूमि शिंपणाऱ्या वळवाच्या पर्जन्याप्रमाणें
आम्हांकडे येईल.
४ हे एफ्राइमा, मी तुला काय करूं? हे यहूदा, मी
तुला काय करूं? तुमचें चांगुलपण सकाळच्या अभ्राप्रमाणें
लवकर उडून जाणाऱ्या दहिंवराप्रमाणें आहे; ५ म्हणून
मीं त्यांजवर संदेष्ट्यांच्या हातून कुऱ्हाड चालविली
आहे, माझ्या तोंडच्या शब्दांनीं त्यांस ठार केलें आहे;
माझा न्याय प्रकाशाप्रमाणें व्यक्त झाला आहे. ६ मी
यज्ञाचा नाहीं तर दयेचा भुकेला आहें; होमार्पणांपेक्षां
देवाचें ज्ञान मला आवडतें. ७ त्यांनीं [1]मनुष्याप्रमाणें
करार मोडिला आहे; तेथें ते मजबरोबर बेइमानपणें
वर्तले आहेत. ८ गिलाद हें दुष्कर्म्यांचें शहर आहे,
त्यावर रक्ताचीं पावलें उमटलीं आहेत. ९ मनुष्यांला
टपणाऱ्या लुटारूंच्या टोळ्यांसारखी याजकांची टोळी
आहे. ते शखेमाच्या वाटेवर खून करितात; त्यांनीं
महापाप केलें आहे. १० इस्राएलाच्या घराण्यांत मीं
घोर प्रकार पाहिला आहे, एफ्राइमांत जारकर्म चालू
आहे; इस्राएल भ्रष्ट झाला आहे. ११ हे यहूदा,
मी आपल्या लोकांचा बंदिवास उलटवीन तेव्हां तुझ्याहि
हंगामाची वेळ येईल. १ जेव्हां इस्राएलास
७ मी बरें करूं पाहतों तेव्हां एफ्राइमाचा अधर्म व
शोमरोनाची दुष्टता दिसून येते; ते दगा करि-
तात, चोर घरांत शिरतो, बाहेर लुटारूंची टोळी लूट करते.
२ त्यांच्या सर्व दुष्टतेचें स्मरण मला आहे हें ते लक्षांत
आणीत नाहींत; आतां त्यांच्याच कर्मांनीं त्यांस घेरिलें
आहे; तीं माझ्या नजरेसमोर आहेत.
३ ते राजाला आपल्या दुष्टतेनें, ते सरदारांस
आपल्या लबाड्यांनीं, खुष करितात. ४ ते सर्व जारकर्म
करणारे आहेत, भटाऱ्यानें तापविलेल्या भट्टीसारखे ते
आहेत, कणीक तिंबवून ती खमिरानें फुगेपर्यंतच
कायतो विस्तव चाळवयाचा राहतो. ५ आमच्या
राजाच्या शुभ दिवशीं सरदार द्राक्षारसानें तप्त होऊन बेजार
झाले; त्यानें आपला हात धर्मनिंदकांच्या हातांत
घातला. ६ कारस्थान करीत असतांना त्यांनीं आपलें
हृदय भट्टीसारखें केलें आहे; त्यांचा कोप रात्रभर निद्रित
राहतो; तो सकाळीं प्रज्वलित अग्नीसारखा पेट घेतो.
७ ते सगळे भट्टीप्रमाणें तप्त असतात; ते आपल्या अधि-
पतींस गिळून टाकितात; त्यांचे सर्व राजे पतन
पावले आहेत; त्यांतला कोणी माझा धावा
करीत नाहीं.
८ एफ्राईम राष्ट्रांमध्यें मिसळतो; एफ्राईम न उलथ-
लेल्या भाकरीसारखा झाला आहे. ९ परक्यांनीं त्याची
शक्ति खाऊन टाकिली आहे, पण तें त्याला कळत नाहीं;
त्याचे केस मधूनमधून पिकलेले दिसतात. पण
तें त्याला कळत नाहीं. १० इस्राएलाचें जो भूषण तो
त्याच्यासमक्ष त्याच्याविरुद्ध साक्ष देतो; इतकें असूनहि
परमेश्वर त्यांचा देव याजकडे ते वळले नाहींत, त्याला
शरण आले नाहींत. ११ एफ्राईम एखाद्या खुळ्या
निर्बुद्ध पारव्यासारखा आहे; ते मिसराला हाक मारि-
तात; अश्शुराकडे धाव घेतात. १२ ते जातील तेव्हां
त्यांजवर मी आपलें जाळें टाकीन, आकाशांतल्या पाखरां-
प्रमाणें त्यांला खालीं पाडीन; त्यांच्या मंडळीनें ऐकलें
आहे त्याप्रमाणें मी त्यांस शिक्षा करीन. १३ त्यांस
धिक्कार असो, कारण ते मजपासून बहकले आहेत;
त्यांचा समूळ नाश होणार, कारण त्यांनीं माझ्याबरोबर
फितुरी केली आहे; त्यांस उद्धरावें अशी माझी इच्छा
होती ते मजविषयीं खोटेंनाटें बोलले आहेत.
१४ त्यांनीं कधीं मनापासून माझा धावा केला नाहीं; ते

१ अथवा : आदामाप्रमाणें

आपल्या बिछान्यांवर पडून धान्य व द्राक्षारस यांसाठीं
ओरडतात; ते जमा होऊन मजविरुद्ध बंड करितात.
१५ मीं त्यांस शिक्षण दिलें व बाहुबल दिलें, तरी ते
माझ्याविरुद्ध वाईट कल्पना मनांत आणितात.
१६ ते परत येतात, पण परात्पराकडे नव्हे;
ते फसविणाऱ्या धनुष्यासारखे झाले आहेत; त्यांचे
सरदार आपल्या जिव्हेच्या उद्दामपणामुळें तरवारीनें
पडतील; यामुळें त्यांची मिसर देशांत अप्रतिष्ठा होईल.

८ १ मुखाला करणा लाव, गरुडासारखा तो
परमेश्वराच्या मंदिरावर उतरतो, कारण त्यांनीं माझा
करार मोडिला आहे, माझ्या नियमशास्त्राचें त्यांनीं
अतिक्रमण केलें आहे. २ हे माझ्या देवा, आम्ही
इस्राएल तुला ओळखितों असें ते माझा धावा करून
म्हणतात. ३ इस्राएलानें चांगल्याचा धिक्कार केला
आहे; शत्रु त्याच्या पाठीस लागेल.
४ त्यांनीं राजे नेमिले आहेत, पण माझ्या विचारानें
नेमिले नाहींत; त्यांनीं अधिपति स्थापिले, पण त्यास
माझी संमति नव्हती; केवळ नष्ट होण्याकरितांच त्यांनीं
आपणांसाठीं आपल्या सोन्यारुप्याच्या मूर्ति केल्या.
५ हे शोमरोना, तुझ्या वासराचा त्याग केला आहे;
त्यांजवर माझा राग पेटला आहे; त्यांस निर्दोषता
प्राप्त होण्यास किती काळ लागेल! ६ कारण हेंहि
इस्राएलाकडूनच झालें; कारागिरानें तें केलें, तें
देव नव्हे; या शोमरोनाच्या वासराचे तुकडेतुकडे
होतील. ७ कारण ते वाऱ्याची पेरणी करून वावटळीची
कापणी करितात; त्याला ताट नाहीं, अंकुराला
कणीस येत नाहीं; आलेंच तर तें परके खाऊन टाकितील.
८ इस्राएलास गिळून टाकिलें आहे, राष्ट्रांमध्यें
ते आतां टाकाऊ भांड्यासारखे झाले आहेत. ९ कारण
ते अश्शूराकडे वर गेले आहेत; ते स्वच्छंदपणें भटक-
णाऱ्या रानगाढवासारखे आहेत; एफ्राइमानें देणग्या
देऊन दोस्ती केली आहे. १० जरी ते राष्ट्रांत देणग्या
देत फिरतात तरी मी आतां त्यांस एकत्र करीन, ते
राजाधिराजाच्या कारभारानें घटत जातील. ११ कारण
एफ्राइमानें पाप करण्यासाठीं पुष्कळ वेद्या केल्या आहेत;
त्या वेद्या त्याला पापमूलक झाल्या आहेत. १२ मीं
त्याच्यासाठीं आपल्या धर्मशास्त्राच्या लाखो आज्ञा
लिहिल्या तरी त्याला त्या परक्याच वाटतात. १३ त्यांनीं
मला केलेलीं यज्ञार्पणें म्हणजे केवळ मांस अर्पून तें खाणें
होय; पण तीं परमेश्वर स्वीकारीत नाहीं; आतां तो
त्यांचा अधर्म स्मरेल व त्यांच्या पापाचें शासन करील;
ते मिसरास परत जातील. १४ कारण इस्राएलानें
आपल्या उत्पन्नकर्त्यास विसरून मंदिरें बांधिलीं आहेत,
यहूदानें तटबंदीचीं नगरें बहुत बांधिलीं आहेत; पण
मी त्याच्या नगरांवर अग्नि पाठवीन, तो त्यांचे वाडे
खाऊन टाकील.

९ १ हे इस्राएला, इतर राष्ट्रांप्रमाणें आनंदानें
उल्लासूं नको, कारण तूं व्यभिचार करून आपल्या
देवाला सोडिलें आहे; प्रत्येक खळ्यावर व्यभिचाराची
कमाई तुला आवडली आहे. २ खळें व द्राक्षाकुंड यांनीं
त्यांचा निर्वाह होणार नाहीं, नवा द्राक्षारस तिला दगा
देईल. ३ ते परमेश्वराच्या देशांत राहावयाचे नाहींत;
एफ्राइम मिसर देशास परत जाईल, ते अश्शूरच्या देशांत
अमंगळ पदार्थ भक्षण करितील. ४ ते परमेश्वराला
द्राक्षारसाचीं पेयार्पणें करणार नाहींत; त्यांचे बलि
त्याला संतोष देणार नाहींत; त्यांचें अन्न त्यांला
सुतक्यांच्या अन्नासारखें होईल; तें खाणारे सर्व अशुद्ध
होतील; त्यांचें अन्न त्यांची क्षुधा शांत करण्याकरितांच
आहे; परमेश्वराच्या मंदिरांत तें आणणार नाहींत.
५ नेमलेल्या सणाच्या दिवशीं व परमेश्वराच्या उत्सवाच्या
दिवशीं तुम्ही काय कराल? ६ कारण पाहा,
विध्वंस झाल्यामुळें ते निघून गेले आहेत; मिसर
त्यांस गोळा करील, मोफ त्यांस मूठमाती देईल; कांटे-
कुसळें त्यांच्या रुपेरी मौल्यवान् पदार्थांचा ताबा घेतील,
त्यांच्या तंबूंत कांटेरीं झुडपें उगतील. ७ समाचार घेण्याचे
दिवस आले आहेत; प्रतिफळाचे दिवस आले आहेत; इस्रा-
एलास हें समजून येईल; तुझ्या दोषराशीमुळें, तुझ्या अति
वैरामुळें, संदेष्टा मूर्ख असा बनला आहे, आत्मसंचार
झालेल्याला वेड लागलें आहे. ८ एफ्राइम माझ्या

१ निर्गम ५:१ टीप पाहा.

देवाचा हेरणारा आहे; संदेष्टा आपल्या सर्व मार्गांत
पारध्याचा फासा आहे, त्याच्या देवाच्या मंदिरांत
वैरभाव आहे. ९ गिबांत घडलेल्या गोष्टींच्या वेळीं
झालें त्यासारिखा त्यांनीं अति भ्रष्टाचार केला आहे; तो
त्यांचा अधर्म स्मरतो; तो त्यांच्या पापांचें प्रतिफळ
देतो.

१० रानांतल्या द्राक्षांप्रमाणें इस्राएल मला आढळला,
अंजिराच्या हंगामांतील प्रथम फळासारखे तुमचे
पूर्वज मला दिसले; पण ते बाल-पौराकडे आले आणि
त्यांनीं लज्जास्पद मूर्तीला आपणांस वाहून घेतलें;
त्यांच्या वल्लभांसारखे ते अमंगळ झाले. ११ एफ्राइमाचें
वैभव पक्ष्यांप्रमाणें उडून जात आहे; जन्म, गर्भारपण
व गर्भसंभव हीं नाहींत, असें झालें आहे. १२ त्यांनीं
मुलें लहानाचीं मोठीं केलीं तरी एकहि मनुष्य उरणार
नाहीं असें मी त्यांस अपत्यहीन करीन; मी त्यांजपासून
निघून जाईन तेव्हां त्यांस धिक्कार असो!
१३ एफ्राईम आपल्या मुलांस बळी देणाऱ्या मनुष्या-
सारखा मला दिसला; तो आपल्या मुलांस वध करणाऱ्या-
कडे घेऊन येईल. १४ हे परमेश्वरा, त्यांस दे;
त्यांस काय देशील? गर्भपात करणारा गर्भाशय व शुष्क
स्तन त्यांस दे. १५ त्यांची सर्व दुष्टता गिल्गालांत आहे,
तेथेंच त्यांच्याविषयीं माझ्या ठायीं द्वेष उद्भवला; त्यांच्या
कर्मांच्या दुष्टतेमुळें त्यांस मी आपल्या मंदिरांतून घालवून
देईन; यापुढें मी त्यांच्यावर प्रीति करणार नाहीं; त्यांचे
सर्व सरदार फितुरी आहेत. १६ एफ्राइमावर तडाका
बसला आहे; त्यांचें मूळ सुकून गेलें आहे;
त्यांस फळ येणार नाहीं; त्यांस संतति झालीच
तर त्यांच्या गर्भाशयाचें तें प्रिय फळ मी मारून टाकीन.
१७ माझा देव त्यांचा त्याग करील, कारण त्यांनीं त्याचें
ऐकलें नाहीं, ते राष्ट्रांराष्ट्रांतून भटकणारे असे होतील.

१ इस्राएल उफाड्यानें वाढणारा द्राक्षींचा
१० वेल आहे, त्यांस भरपूर फळें येतात; जों जों
त्याला जास्त फळें आलीं तों तों त्यानें जास्त
वेद्या केल्या; त्याची जमीन जसजशी सुपीक होत गेली
तसतसे त्यानें अधिक सुरेख मूर्तिस्तंभ उभारिले.
२ त्यांचें हृदय बेइमान आहे, आतां त्यांस प्रायश्चित्त
मिळालेंच पाहिजे; तो त्यांच्या वेद्या मोडून टाकील,
तो त्यांचे मूर्तिस्तंभ उद्ध्वस्त करील. ३ आतां ते
निश्चयें म्हणतील, आम्हांला राजा नाहीं, कारण आम्हीं
परमेश्वराचें भय बाळगिलें नाहीं; राजा आमच्या
काय कामाचा?

४ ते फक्त वचनें बोलतात, खोट्या प्रतिज्ञा करितात, करार
करितात, म्हणून शेताच्या तासांत विषवल्ली उगवते तसें
त्यांच्यासाठीं प्रतिफळ उगवेल. ५ बेथ-आवेनच्या वासरां-
साठीं शोमरोनांतले रहिवासी घाबरे होतील; तेथले लोक
त्याजविषयीं शोक करितील, त्याचे पुजारी जे त्याच्या
वैभवाबद्दल आनंद करीत असत ते आतां त्याकरितां
विलाप करितील, कारण तें त्यांस अंतरलें आहे, ६ यारेब
राजासाठीं भेट म्हणून तें अश्शूरास नेतील; एफ्राईम
लज्जेनें व्याप्त होईल, इस्राएलास आपल्या स्वतांच्या
मसलतीची लाज वाटेल; ७ शोमरोन नाश पावला आहे,
त्याचा राजा पाण्यावर तरंगणाऱ्या ढलप्यासारखा आहे.
८ इस्राएलाचें पाप म्हणजे आवेनचीं उच्चस्थानें नाश
पावतील; त्यांच्या वेद्यांवर कांटेकुसळें व कांटेरी झुडपें
उगवतील; ते पर्वतांस म्हणतील, आम्हांस झाकून टाका,
टेकड्यांस म्हणतील, आम्हांवर पडा.

९ हे इस्राएला, गिबांत घडलेल्या गोष्टींच्या वेळेपासून
तूं पाप करीत आला आहेस; तेथेंच ते अद्यापि आहेत;
गिबांत दुष्कर्म्यांबरोबर झालेल्या लढाईंत ते सांपडले नाहींत.
१० मला वाटेल तेव्हां मी त्यांस शासन करीन; त्यांस
त्यांच्या दोन्ही पातकांस्तव शासन करण्यास त्यांच्याविरुद्ध
राष्ट्रें गोळा होतील. ११ एफ्राईम शिकविलेली कालवड
आहे, तिला मळणी करण्याची आवड आहे; मी तिच्या
सुंदर मानेवर जूं ठेवीन, मी एफ्राइमाला जुंपीन; यहूदा
नांगरील, याकोब कोळपील.

१२ तुम्हीं आपणांसाठीं धार्मिकतेची पेरणी करा
म्हणजे प्रेमाची कापणी कराल; पडीत जमीन नांगरून
काढा; कारण परमेश्वरानें येऊन तुम्हांवर धार्मिकतेची वृष्टि
करावी याकरितां त्याला शरण जाण्याचा हा समय आहे.
१३ तुम्हीं दुष्टतेच्या पेरणीसाठीं नांगरिलें; अधर्माची
कापणी केली, तुम्हीं लबाडीचें फळ खाल्लें; कारण तूं आपल्या

१ पाठभेद : सोराप्रमाणें रम्य स्थळीं बसलेल्यासारखा

मोंगीवर भिस्त ठेविली, आपल्या पराक्रमी वीरसमूहा-
वर भाव ठेविला. १४ तुझ्या लोकांमध्यें कलह माजेल;
युद्धसमयीं शल्मनानें बेथ-आर्बेलास उद्ध्वस्त केलें तेव्हां
आईला मुलांसह आपटून मारिलें, तशीं तुझीं सर्व तट-
बंदीचीं नगरें नाश पावतील. १५ तुमच्या दुष्टतेच्या
अघोरतेमुळें बेथेल येथें तुम्हांस असें होईल; प्रभातकाळीं
इस्राएलाचा राजा नाश पावेल.

११ १ इस्राएल लहान मूल असतां त्याजवर माझी
प्रीति बसली; मीं त्याला आपला पुत्र म्हणून
मिसरांतून बोलाविलें. २ जों जों मी बोलावीं
तों तों ते मजपासून दूर जात; ते बालमूर्तीस बलि
अर्पीत, कोरीव मूर्तीपुढें धूप जाळीत. ३ मींच एफ्रा-
इमास बालवयास शिकविलें, मीं त्यांस आपल्या कवेंत
वागविलें; आणि मी त्यांस बरें केलें, पण तें त्यांस
ठाऊक नाहीं. ४ मानवी बंधनांनीं, प्रेमरज्जूंनीं, मीं
त्यांस ओढिलें; बैलाच्या गळ्यांतलें जोतें सैल करणाऱ्या-
सारखा मी त्यांस झालों; त्यांस मीं ममतेनें खाऊं
घातलें. ५ तो मिसर देशांत परत जाणार नाहीं,
तर अश्शूर त्याचा राजा होईल; कारण ते मजकडे
परत येण्यास मान्य झाले नाहींत. ६ त्यांच्या मसलती-
मुळें तरवार त्यांच्या नगरांवर फिरेल. ती त्यांचे
अडसर मोडूनतोडून खाऊन टाकील. ७ माझ्या
लोकांचा मजपासून धर्मभ्रष्ट होण्याकडे कल आहे,
आणि त्यांस बोलाविलें असतां कोणी उठून दृष्टि
वर करीत नाहींत.
८ हे एफ्राइमा, मी तुला कसा सोडून देईन? हे
इस्राएला, मी तुला कसें बहकूं देईन? मी तुला अदमा-
सारखें करूं काय? सबोईमासारखें करूं काय? माझें
हृदय खळबळलें आहे, माझ्या कळवळ्यास ऊत आला
आहे. ९ मी आपल्या क्रोधसंतापाप्रमाणें करणार नाहीं,
मी एफ्राइमाचा नाश करण्याकरितां मागें फिरणार नाहीं;
कारण मी देव आहें, मनुष्य नव्हें; तुजमध्यें असणारा
पवित्र प्रभु तो मी आहें; मी क्रोधावेशानें येणार नाहीं.
१० ते परमेश्वरामागून जातील, तो सिंहासारखा गर्जेल,
तो गर्जेल आणि त्यांचे पुत्र पश्चिमेकडून थरथर कांपत
येतील. ११ मिसर देशांतून पक्षी व अश्शूर देशांतून
पारवे येतात तसे ते थरथर कांपत येतील, व मी त्यांस
त्यांच्या घरांत बसवीन, असें परमेश्वर म्हणतो.
१२ एफ्राइमानें लबाड्यांनीं मला घेरिलें आहे;
इस्राएलाच्या घराण्यानें कपटानें मला घेरिलें आहे. देव
जो सत्य व पवित्र त्याजबरोबर यहूदाहि बेबंदपणानें
वागतो.

१२ १ एफ्राईम वायूची जोपासना करितो,
पूर्वेच्या वाऱ्याच्या मागें लागतो; दिवसभर तो
लबाडी व नाश यांची वृद्धि करितो; ते अश्शुरा-
बरोबर करार करितात, मिसर देशास तेल नेतात.
२ परमेश्वराचा यहूदाबरोबर वाद आहे, तो याकोबाला
त्याच्या आचरणाप्रमाणें शासन करील; त्याच्या कर्मा-
प्रमाणें तो त्याला प्रतिफळ देईल. ३ गर्भाशयांत असतां
त्यानें आपल्या भावाची टांच धरिली; तो आपल्या
भरज्वानींत असतां देवाबरोबर झगडला; ४ म्हणजे
अर्थात् दिव्यदूताबरोबर झगडून तो जय पावला, त्यानें
रडून देवाची करुणा भाकिली; त्याला देवाचें बेथेलास
दर्शन झालें तेथें तो आमच्याबरोबर बोलला. ५ परमेश्वर,
सेनाधीश देव परमेश्वर, हें नाम त्याचें स्मारक आहे;
६ म्हणून तूं आपल्या देवाकडे वळ; दया व न्याय
यांचें पालन कर; आपल्या देवाची प्रतीक्षा करून राहा.
७ कनानाच्या हातीं खोटा ताजवा आहे; जुलम
करणें त्याला आवडतें. ८ एफ्राईम म्हणतो, मी खरोखर
धनवान् झालों आहें, मीं संपत्ति मिळविली आहे,
पापाचा बट्टा लागेल असा अधर्म माझ्या सर्व कमाईंत
माझ्या हातून झाला नाहीं. ९ मिसर देशापासून मी परमे-
श्वर तुझा देव आहें, उत्सवाच्या दिवसांप्रमाणें मी तुला
पुनः तंबूंत राहावयास लावीन. १० मी संदेष्ट्यांबरोबर
बोललों आहें; मींच दिव्यदर्शनांची रेलचेल केली आहे
आणि संदेष्ट्यांच्या द्वारें मीं दृष्टांत देऊन बोध केला आहे.
११ गिलाद मूर्तिपूजक बनला आहे ना? तर तो शून्यवत्
होऊन जाईल; गिल्गालांत त्यांनीं बैल अर्पिले; त्यांच्या

१ पाठभेद : रथांवर

१ अथवा : व्यापाऱ्याच्या

वेद्या शेतांच्या तासांतील दगडांच्या राशींसारख्या
आहेत. १२ याकोब अरामाच्या रानांत पळून गेला;
इस्राएलानें बायकोसाठीं चाकरी केली, बायकोसाठीं मेंढरें
राखिलीं. १३ एका संदेष्ट्याच्या हस्तें परमेश्वरानें इस्रा-
एलास मिसर देशांतून बाहेर आणिलें, दुसऱ्या संदेष्ट्याच्या
हस्तें त्याचें रक्षण करविलें. १४ एफ्राइमानें क्रोध
अत्यंत चेतविला आहे, त्याचा रक्तपातदोष त्याजवर
तसाच राहील, आणि त्याचा प्रभु त्यानें केलेल्या
अप्रतिष्ठेचें उसनें फेडील.

१३

१ एफ्राईम बोलत असे तेव्हां लोकांचा
थरकांप होई; तो इस्राएलांचा सरदार झाला; पण
पुढें बालमूर्तीच्यामुळें दोषी होऊन तो लोपला.
२ ते आतांहि अधिकाधिक पाप करीत आहेत, ते
आपल्याजवळच्या रुप्याच्या आपणांसाठीं ओतींव मूर्ति
करीत आहेत; ते आपल्या कल्पनेप्रमाणें मूर्ति करीत
आहेत; त्या सर्व कारागिरांच्या कृति आहेत; ते अशा
मूर्तीबरोबर बोलतात, यज्ञ करणारीं मनुष्यें वासरांचें
चुंबन घेतात. ३ ह्यास्तव ते सकाळच्या अभ्रासारखे,
लवकर उडून जाणाऱ्या दहिंवरासारखे होतील, खळ्यांतून
वावटळीनें उडणाऱ्या भुसाप्रमाणें, धुराड्यांतून निघणाऱ्या
धुराप्रमाणें ते होतील.

४ मिसर देशापासून मी परमेश्वर तुझा देव आहें,
मजपरता अन्य देव तुला ठाऊक नाहीं, मजवांचून कोणी
त्राता नाहीं. ५ मी रानांत, रखरखीत प्रदेशांत, तुला
खाऊं घातलें. ६ जसा त्यांस चारा मिळाला तसे ते चरून
तृप्त झाले; ते तृप्त झाले तेव्हां त्यांचें हृदय उन्मत्त झालें
आणि ते मला विसरले. ७ यास्तव मी त्यांस सिंहासारखा
झालों आहे, मी चित्त्यासारखा वाटेवर दबा धरून बसेन.
८ जिचीं पिलें हरण केलीं आहेत अशा अस्वलीसारखा
मी त्यांजवर हल्ला करीन, मी त्यांचे ऊर फाडून टाकीन,
मी त्यांस तेथें सिंहासारखें खाऊन टाकीन; वनपशु त्यांस
फाडून त्यांचे तुकडे तुकडे करितील. ९ हे इस्राएला,
जो मी तुझा साहाय्यकर्ता त्या मजवर तूं उलटलास,
त्यामुळें तुझा नाश झाला. १० तुझ्या सर्व नगरांतून तुझा
बचाव करणारा तुझा राजा कोठें गेला ? ज्या तुझ्या
शास्त्यांच्या बाबतींत तूं म्हणावेंस कीं मला राजा व
अधिपति असावे, ते कोठें गेले ? ११ मीं तुजवर कोपून
तुला राजा दिला व तुजवर रागावून तो काढून नेला.
१२ एफ्राइमाच्या अधर्माचें गाठोडें बांधून ठेविलें आहे,
त्याचें पाप जमवून ठेविलें आहे. १३ प्रसूत होणाऱ्या
स्त्रीच्या वेदना त्याला लागतील; तो अक्कलशून्य मुलगा
आहे, कारण तो गर्भाशयाच्या द्वारानजीक योग्य वेळीं
येत नाहीं. १४ अधोलोकाच्या तावडींतून मी त्यांला
उद्धरीन काय ? मृत्यूपासून त्यांला मुक्त करीन
काय ? अरे मृत्यू, तुझ्या महामाऱ्या कोठें आहेत ? अरे
अधोलोका, तुजकडून होणारा विनाश कोठें आहे ? माझ्या
दृष्टीपासून कळवळा लपला आहे.

१५ तो जरी आपल्या भाऊबंदांत फलद्रूप आहे तरी
पूर्वेचा वारा, रानांतून परमेश्वराचा वारा, येईल आणि
त्याची विहीर आटेल, त्याचा झरा सुकून जाईल;
तो त्याच्या निधींतील सर्व मनोरम वस्तु हरण करील.
१६ शोमरोनास प्रायश्चित्त मिळेल कारण तो आपल्या
देवापासून फितुरी झाला आहे; ते तरवारीनें पडतील,
त्यांचीं अर्भकें आपटून मारितील, त्यांच्या गर्भवती
स्त्रियांस चिरून टाकितील.

१४

१ हे इस्राएला, परमेश्वर तुझा देव याज-
कडे वळ, कारण तूं आपल्या अधर्मामुळें ठोकर
खाऊन पडला आहेस. २ तुम्ही शब्दांनिशीं
परमेश्वराकडे वळा; त्याला म्हणा, आमचा सर्व अधर्म दूर
कर; कृपेनें आमचा स्वीकार कर, म्हणजे आम्ही आमच्या
वाणीचें फळ अर्पूं. ३ अश्शूर आमचा बचाव करणार
नाहीं, आम्ही घोड्यांवर स्वार होणार नाहीं, आमच्या
हातच्या कृतीस, आमच्या देवा, असें यापुढें आम्ही
म्हणणार नाहीं, कारण तुजजवळ पोरक्यांस दया मिळते.

४ मी त्यांला वाटेवर आणीन, त्यांजवर मोकळ्या मनानें
प्रीति करीन, कारण त्यांजवरचा माझा राग गेला आहे. ५ मी
इस्राएलास दहिंवरासारखा होईन; तो भूकमलाप्रमाणें फुलेल,
लबानोनाप्रमाणें मूळ धरील. ६ त्याच्या फांद्या पसरतील,
त्याचें सौंदर्य जैतून वृक्षासारखें होईल, त्यास लबानोना-
सारखा वास सुटेल. ७ ते परत येऊन त्याच्या छायेंत

राहतील; ते धान्यासारखे पुनर्जीवित होतील व द्राक्षी-
प्रमाणें फळें देतील; त्यांची कीर्ति लबानोनाच्या द्राक्षा-
रसाच्या सारखी होईल. ८ एफ्राइमाला यापुढें मूर्तींशीं
काय कर्तव्य आहे? मी तर त्याचें ऐकून त्याजवर
लक्ष ठेवीन; मी हिरव्यागार सरूसारखा आहें, मज-
पासून तुला फळ मिळतें.
९ जो कोणी शहाणा आहे त्याला हें समजेल, जो
कोणी समंजस आहे त्याला हें कळेल; परमेश्वराचे मार्ग
सरळ आहेत; त्यांनीं धार्मिक चालतील आणि पातकी
त्यांत अडखळून पडतील.

# योएल



१ पथूएलाचा पुत्र योएल याला परमेश्वराचें
**१** वचन प्राप्त झालें तें हें:
२ अहो वृद्धहो, हें ऐका; देशांत राहणारे सर्व
जनहो, कान द्या. तुमच्या काळीं अथवा तुमच्या वाड-
वडिलांच्या काळीं अशी गोष्ट कधीं घडली होती काय?
३ तुम्ही हें आपल्या मुलांबाळांस कळवा, तुमच्या
मुलांनीं आपल्या मुलांबाळांस कळवावें व त्यांच्या
मुलांनीं आपल्या पुढच्या पिढीस कळवावें. ४ कुर-
तुडणाऱ्या टोळापासून जें राहिलें तें झुंडींनीं येणाऱ्या
टोळांनीं खाल्लें; झुंडींनीं येणाऱ्या टोळांपासून जें राहिलें
तें चाटून खाणाऱ्या टोळांनीं खाल्लें; चाटून खाणाऱ्या
टोळांपासून जें राहिलें तें अधाशी टोळांनीं
खाल्लें.
५ अहो मद्यप्यांनो, जागे व्हा आणि रडा; द्राक्षारस
पिणाऱ्यांनो, तुम्ही सर्व नव्या द्राक्षारसाकरितां विलाप
करा, कारण तो तुमच्या तोंडचा काढून घेतला आहे.
६ माझ्या देशावर बळकट व असंख्य लोक आले
आहेत; त्यांचे दांत सिंहाच्या दांतांसारखे आहेत;
त्यांस सिंहिणीचे सुळे आहेत. ७ त्यांनीं माझ्या द्राक्ष-
वेलांची नासधूस केली आहे; माझ्या अंजिराच्या
झाडाच्या ढलप्या काढिल्या आहेत, सोलून सोलून त्यांनीं
त्याची साल काढून टाकिली आहे, आणि त्याच्या फांद्या
पांढऱ्या झाल्या आहेत. ८ तरुण स्त्री गोणताट नेसून
आपल्या तरुणपणच्या पतीकरितां शोक करिते तसा
शोक करा. ९ परमेश्वराच्या मंदिरांत अन्नार्पण व पेया-
र्पण हीं येण्याचीं बंद झालीं आहेत; परमेश्वराची सेवा
करणारे याजक शोक करीत आहेत. १० शेताचें रान
झालें आहे; भूमि रुदन करीत आहे, कारण पिकाचा
नाश झाला आहे; नवा द्राक्षारस आटला आहे; तेल
क्षय पावलें आहे. ११ शेतकऱ्यांनो, निराश व्हा;
द्राक्षीचे मळे करणाऱ्यांनो, गहूं व जवस यांकरितां
विलाप करा, कारण शेताचें पीक नष्ट झालें आहे.
१२ द्राक्षीचा वेल वाळला आहे, अंजिराचें झाड
कोमेजून गेलें आहे; डाळिंब, ताड व सफरचंद अशीं
मळ्यांतील सर्व झाडें सुकून गेलीं आहेत; मानव-
जातीचा आनंद आटला आहे.
१३ याजकहो, गोणताट लेऊन शोक करा; वेदीची
सेवा करणाऱ्यांनो, विलाप करा; माझ्या देवाच्या
सेवकांनो, या, गोणताटावर पडून रात्र घालवा, कारण
तुमच्या देवाच्या मंदिरांत अन्नार्पण व पेयार्पण येण्याचें
बंद झालें आहे. १४ उपासाचा एक पवित्र दिवस नेमा,
पवित्र मेळा भरवा, तुमचा देव परमेश्वर याच्या मंदिरांत
वडिलांस व देशांत राहणाऱ्या सर्वांस जमवा व परमे-
श्वराला आरोळी मारा.
१५ त्या दिवसाबद्दल हायहाय करा! भयंकर दिवस!
परमेश्वराचा दिवस जवळ येऊन ठेपला आहे, सर्वसमर्था-
कडून विनाशमय असा तो येत आहे. १६ आमच्या
डोळ्यांदेखत आमचें अन्न काढून घेतलें नाहीं काय?

आमच्या देवाच्या मंदिरांतील आनंद व उत्साह नष्ट
झाले नाहींत काय? १७ ढेकळांखालीं धान्यास
कुरा चढला आहे, पेवें रिकामीं पडलीं आहेत;
कोठारें पडून गेलीं आहेत; कारण पिकें बुडालीं आहेत.
१८ गुरेंढोरें कशीं धापा टाकीत आहेत! बैलांचे कळप
बावरले आहेत, कारण त्यांस चारा नाहीं; मेंढरांचे
कळपहि पीडले आहेत. १९ हे परमेश्वरा, तुझा मी
धावा करितों, कारण रानांतील कुरणें अग्नीनें खाल्लीं
आहेत, शेतांतील सर्व झाडें ज्वालांनीं भस्म केलीं
आहेत. २० वनपशूंनाहि तुझा सोस लागला आहे,
तुझा सोस लागून ते धापा टाकीत आहेत; पाण्याचे
ओढे सुकून गेले आहेत; अग्नीनें रानांतील कुरणें
खाऊन टाकिलीं आहेत.

२ १ सीयोनांत करणा वाजवा, माझ्या पवित्र
पर्वतावर नौबत वाजवा; देशांत राहणारे सर्व
थरथर कांपोत, कारण परमेश्वराचा दिवस येत
आहे, तो येऊन ठेपला आहे. २ अंधाराचा व औदा-
सीन्याचा दिवस, मेघमय अभ्राच्छादित दिवस येत
आहे. डोंगरांवर प्रभातेचा प्रकाश पसरतो तसें महान् व
बलवान् राष्ट्र येत आहे; पूर्वी कधींच असा प्रकार झाला
नाहीं; पुढें पिढ्यानपिढ्या असा कधीं होणार नाहीं.
३ त्यांच्यापुढें अग्नि भस्म करीत चालला आहे, त्यांच्या-
मागें ज्वाला जाळीत चालली आहे, त्यांच्यापुढील
प्रदेश एदेन बागेसारखा आहे, त्यांच्यामागील
प्रदेश ओसाड रान आहे; त्यांतून बचावून कांहींच राहत
नाहीं. ४ त्यांचें स्वरूप घोड्यांच्या स्वरूपासारखें आहे.
स्वारांसारखे ते धावतात. ५ ते उड्या टाकितात, त्यांचा
आवाज डोंगरमाथ्यांवरून जाणाऱ्या रथांच्या आवाजा-
सारखा आहे; धसकट खाऊन टाकणाऱ्या ज्वालेच्या
कडकडण्यासारखा ते आवाज करितात; युद्धासाठीं
सज्ज झालेल्या बलवान् राष्ट्रासारखे ते आहेत. ६ त्यांच्या-
पुढें राष्ट्रें व्यथित होतात, सर्वांचीं तोंडें काळ-
वंडतात. ७ वीरांप्रमाणें ते धावतात, योद्ध्यांप्रमाणें ते
तट चढून जातात, ते प्रत्येक आपआपल्या मार्गानें
कूच करितात, ते आपली दिशा सोडीत नाहींत. ८ ते
एकमेकांस रेटून चालत नाहींत; ते आपआपल्या
वाटेनें जातात; समोर शस्त्रें असतां ते जखम न होतां
त्यांतून पार जातात. ९ ते शहरांतून इकडेतिकडे
फिरतात, ते भिंतीवरून चालतात, ते चढून घरांत
शिरतात, चोरासारखे खिडक्यांतून प्रवेश करितात.
१० त्यांच्यापुढें पृथ्वी कांपते, आकाश थरथरतें, सूर्य
व चंद्र काळे पडतात, तारे प्रकाशावयाचे थांबतात.
११ परमेश्वर आपल्या सैन्यापुढें गर्जना करितो; कारण
त्याचा तळ विस्तीर्ण आहे; त्याचा हुकूम बजाविणारा
बलवान् आहे; परमेश्वराचा दिवस मोठा व फार भयं-
कर आहे; त्या वेळीं कोण टिकेल?

१२ आतां तरी परमेश्वराचें वचन ऐका; मनःपूर्वक
मजकडे वळा; उपोषण, आक्रंदन व शोक करून
वळा. १३ आपलीं वस्त्रें नव्हे, तर आपलें हृदय फाडा
आणि परमेश्वर तुमचा देव याजकडे वळा, कारण तो
कृपाळू, कनवाळू, मंदक्रोध, दयासागर आहे; अरिष्ट
आणिल्याबद्दल त्याला वाईट वाटण्यासारखें आहे.
१४ परमेश्वर तुमचा देव याला कळवळा येऊन तो
मागें वळेल व आपल्यामागें आशीर्वाद ठेवून जाईल
कीं नाहीं कोण जाणें; असें कीं जेणेंकरून तुम्हांस त्याला
अन्नार्पण व पेयार्पण करितां येईल.

१५ सियोनांत करणा वाजवा; उपासाचा एक
पवित्र दिवस नेमा, पवित्र मेळा भरवा. १६ लोकांस
जमवा, मंडळी शुद्ध करा, वडिलांस जमवा, मुलें व
स्तनपान करणारीं अर्भकें यांसहि एकत्र करा; वर
आपल्या खोलींतून व वधू आपल्या मंडपांतून बाहेर
येवोत. १७ देवडी व वेदी यांच्यामध्यें याजक,
परमेश्वराचे सेवक, रुदन करीत म्हणोत, हे परमेश्वरा,
आपल्या लोकांवर करुणा कर; आपल्या वतनाची
अप्रतिष्ठा होऊं देऊं नको; होऊं देशील तर राष्ट्रें
त्यांची निर्भर्त्सना करितील; त्यांचा देव आतां कोठें
गेला असें राष्ट्रांनीं कां म्हणावें?

१८ तेव्हां परमेश्वरानें आपल्या देशाविषयीं ईर्ष्या
धरिली, तो आपल्या लोकांविषयीं कळवळला. १९ पर-
मेश्वरानें आपल्या लोकांची विनवणी ऐकून म्हटलें,

पाहा, मी तुम्हांस धान्य, नवा द्राक्षारस व तेल पाठवून
देतों, त्यांनीं तुम्ही तृप्त व्हाल; यापुढें राष्ट्रांमध्यें मी
तुम्हांला निंदास्पद करणार नाहीं. २० उत्तरेकडून
आलेल्यास तुम्हांपासून घालवून रुक्ष व वैराण प्रदेशांत
हाकून देईन; त्याची अघाडी पूर्व समुद्रांत व पिछाडी
पश्चिम समुद्रांत हाकून देईन; त्याचा दुर्गंध, त्याची
घाण, वर येईल; कारण त्यानें उन्मत्तपणाचीं कृत्यें केलीं
आहेत.

२१ अगे भूमि, भिऊं नको, उल्लास कर, हर्ष कर,
कारण परमेश्वरानें महत्कृत्यें केलीं आहेत. २२
वनपशूंनो, भिऊं नका, कारण वनांतलीं कुरणें
हिरवीं होत आहेत, झाडें फळें देत आहेत, अंजिराचें
झाड व द्राक्षीचा वेल आपलें सत्त्व देत आहेत.
२३ सीयोनपुत्रहो, परमेश्वर तुमचा देव याच्या ठायीं
उल्लास करा, हर्ष करा; कारण तुम्हांस हितकर होईल
इतका आगोटीचा पाऊस तो देतो; तो पहिली पर्जन्य-
वृष्टि म्हणजे आगोटीचा व वळवाचा पाऊस पाडितो.
२४ मग खळीं गव्हानें भरून जातील, कुंडें नव्या
द्राक्षारसानें व तेलानें उपळून जातील. २५ मीं तुम्हां-
वर पाठविलेलें आपलें महासैन्य म्हणजे झुंडींनीं येणारे
टोळ, चाटून खाणारे टोळ, अघाशी टोळ व कुरतुडणारे
टोळ यांनीं ज्या वर्षांचें उत्पन्न खाल्लें त्यांची तुम्हांस भरपाई
करून देईन. २६ तुम्ही भरपूर अन्न खाल आणि तृप्त व्हाल
व ज्यानें तुम्हांसाठीं आश्चर्याचीं कृत्यें केलीं तो तुमचा
देव परमेश्वर याच्या नामाची स्तुति कराल; माझी
प्रजा कधींहि लज्जित होणार नाहीं. २७ तुम्ही समजाल
कीं इस्राएल लोकांमध्यें मी आहें; मी परमेश्वर तुमचा
देव आहें; अन्य कोणी नाहीं; व माझी प्रजा कधींहि
फजीत होणार नाहीं.

२८ यानंतर असें होईल कीं मी आपल्या
आत्म्याचा मनुष्यमात्रावर वर्षाव करीन, तेव्हां तुमचे
पुत्र व तुमच्या कन्या संदेश देतील, तुमच्या वृद्धांस
स्वप्नें पडतील, तुमच्या तरुणांस दृष्टांत होतील.
२९ तुमचे दास व दासी यांवरहि त्या समयीं मी
आपल्या आत्म्याचा वर्षाव करीन. ३० मी आकाशांत
व पृथ्वीवर रक्त, अग्नि व धुराचे लोट अशीं चिन्हें
दाखवीन. ३१ परमेश्वराचा महान् व भयंकर दिवस
येण्यापूर्वीं सूर्य अंधकारमय व चंद्र रक्तमय होईल.
३२ तेव्हां असें होईल कीं जो कोणी परमेश्वराचा
धावा करील तो तरेल; कारण परमेश्वरानें म्हटल्या-
प्रमाणें निभावलेले सीयोन डोंगरावर व यरुशलेमांत
राहतील आणि परमेश्वरानें ज्यांना बोलाविलें ते बाकी
उरलेल्यांत राहतील.

३ १ पाहा, त्या समयीं मी यहूदा व यरुशलेम
यांचा बंदिवास फिरवीन; २ तेव्हां सर्व राष्ट्रें जमा
करून यहोशाफाट (परमेश्वर न्याय करितो) ह्या
नांवाच्या खोऱ्यांत आणीन, आणि माझे लोक, माझें
वतन इस्राएल, यांस त्यांनीं राष्ट्रांत विखरून माझा देश
वांटून घेतला म्हणून तेथें त्यांजवर दावा मांडीन. ३
त्यांनीं माझे लोक पणाला लाविले, त्यांनीं मुलगा देऊन
वेश्या घेतली, द्राक्षारस प्यावयासाठीं त्यांनीं मुलगी
विकली. ४ सोर, सीदोन व पलेशेथाचे सर्व प्रदेश-
हो, तुम्ही माझें काय करणार? मीं केलेल्याचा बदला
देतां काय? अथवा मजला कांहीं करितां काय? मी
त्वरेनें तुमचें कृत्य तुमच्या माथीं मारीन. ५ कारण
तुम्हीं माझें सोनेंरुपें हरण केलें आहे, तुम्हीं माझीं उत्तम
रत्नें आपल्या देवळांत नेलीं आहेत. ६ यहूदा व यरुश-
लेम यांतील लोकांस त्यांच्या देशांतून काढून दूर
न्यावें म्हणून तुम्हीं त्यांस ग्रीस येथील लोकांस
विकलें. ७ पाहा, जेथें तुम्हीं त्यांस विकून पाठविलें
तेथून त्यांची उठावणी करून त्यांस मी आणीन आणि
तुमची कृति तुमच्या माथीं मारीन; ८ आणि तुमचे
पुत्र व कन्या यांस विकून यहूद्यांच्या हातीं देईन
आणि ते त्यांस दूरच्या राष्ट्रांस म्हणजे शबाई लोकांस
विकितील असें परमेश्वरानें म्हटलें आहे.

९ राष्ट्रांमध्यें हें जाहीर करा; यज्ञयाग करून
लढाईची तयारी करा, वीरांची उठावणी करा; सर्व
लढवय्यांना एकवट होऊं द्या, आणि त्यांस चाल करूं
द्या. १० तुमचे फाळ ठोकून त्यांच्या तरवारी बनवा,
आपल्या कोयत्यांचे भाले बनवा; अशक्तहि मी वीर

* अथवा : धार्मिकतेस अनुसरून आगोटीचा पाऊस

मुळांत : यावान

आहें असें म्हणो. ११ सभोंवतालच्या सर्व राष्ट्रांनो,
त्वरा करून या व एकत्र जमा; हे परमेश्वरा, तुझे
वीर तेथें आण. १२ राष्ट्रें उठावणी करून यहोशा-
फाटाच्या खोऱ्यांत येवोत; येथें मी न्यायासनावर
बसून सभोंवतालच्या सर्व राष्ट्रांचा न्याय करणार आहें.
१३ विळा चालवा, पीक तयार आहे; या, चला,
उतरा; द्राक्षांचा घाणा भरला आहे; कुंडें भरून वाहत
आहेत; कारण लोकांची दुष्टाई फार आहे.
१४ लोकांच्या झुंडी, निर्णयाच्या खोऱ्यांत लोकांच्या
झुंडी आहेत, कारण निर्णयाच्या खोऱ्यांत परमेश्वराचा
दिवस येऊन ठेपला आहे. १५ सूर्य व चंद्र काळे
पडले आहेत, तारे प्रकाशावयाचे थांबतात. १६
परमेश्वर सीयोनांतून गर्जना करितो, यरुशलेमांतून
आपला शब्द ऐकवितो, आकाश व पृथ्वी थरथर
कांपत आहेत, तरी परमेश्वर आपल्या लोकांचा आश्रय
आहे, इस्राएल लोकांचा दुर्ग आहे. १७ सीयोनावर,
माझ्या पवित्र डोंगरावर राहणारा परमेश्वर तुमचा
देव मी आहें हें तुम्हांस कळेल, तेव्हां यरुशलेम पवित्र
स्थळ होईल, यापुढें परके त्यांतून येणारजाणार नाहींत.
१८ त्या काळीं असें होईल कीं पर्वतांवरून नवा
द्राक्षारस पाझरेल, टेकड्यांवरून दूध वाहील, व
यहूदाचे सर्व ओहोळ पाण्यानें भरून वाहतील; परमे-
श्वराच्या मंदिरांतून झरा निघेल तो शिट्टिमाच्या
खोऱ्यास पाणी पुरवील. १९ मिसर देश उजाड होईल
व अदोम वैराण होईल, कारण त्यांनीं आपल्या देशांत
निर्दोष रक्त पाडून यहूदाच्या वंशजांवर बलात्कार
केला. २० यहूदा तर सर्वकाळ वसेल, यरुशलेम
पिढ्यानपिढ्या राहील. २१ त्यांचें पाडिलेलें रक्त मी
निर्दोष ठरवीन, तें पूर्वी निर्दोष ठरविलें नव्हतें; कारण
परमेश्वर सीयोनांत वस्ती करितो.

# आमोस



१ तकोवा येथील मेंढपाळांतला आमोस याला,
१ यहूदाचा राजा उज्जीया व इस्राएलाचा राजा
योवाशाचा पुत्र यराबाम यांच्या काळीं, भूमिकंपा-
पूर्वी दोन वर्षें, इस्राएलाविषयीं दृष्टांतरूपानें प्राप्त
झालेलीं वचनें हीं :
२ तो म्हणाला, परमेश्वर सीयोनांतून गर्जना करितो,
यरुशलेमांतून आपला शब्द ऐकवितो, मेंढपाळांचीं कुरणें
शोक करितात व कर्मेलाचा माथा सुकून गेला आहे.
३ परमेश्वर म्हणतो, दिमिष्काचे तीन काय पण चार
अपराध झाले, म्हणून मी शासन करण्यापासून माघार
घेणार नाहीं; कारण मळणी करण्याच्या लोखंडी यंत्रांनीं
त्यांनीं गिलादाला मळिलें. ४ तर हजाएलाच्या
घरावर अग्नि पाठवीन; तो बेन-हदाद याचे महाल
जाळून फस्त करील. ५ दिमिष्काचा अडसर मोडून
टाकीन, आवेन खोऱ्यांतील सिंहासनारूढ असलेला व
बेथएदनाचा राजवेत्रधारी यांचा निःपात करीन;
अरामाच्या लोकांस पाडाव करून कीरास नेतील, असें
परमेश्वर म्हणतो.
६ परमेश्वर म्हणतो, गज्जाचे तीन काय पण चार
अपराध झाले, म्हणून मी शासन करण्यापासून माघार
घेणार नाहीं; कारण त्यांनीं अदोमाच्या हवालीं करण्यासाठीं
झाडून सर्व लोकांस बंदिवान करून नेलें; ७ तर मी
गज्जाच्या तटावर अग्नि पाठवीन, तो त्याचे महाल जाळून
फस्त करील. ८ मी अश्दोदांतील सिंहासनारूढ असलेला
व अष्कलोनचा राजवेत्रधारी यांचा निःपात करीन;
एक्रोनावर माझा हात चालवीन व पलिष्ट्यांचा निःशेष

नाश होईल, असें प्रभु परमेश्वर म्हणतो.
९ परमेश्वर म्हणतो, सोराचे तीन काय पण चार
अपराध झाले, म्हणून मी शासन करण्यापासून माघार
घेणार नाहीं; कारण त्यांनीं झाडून सारे बंदिवान
अदोमाच्या हातीं दिले व ते भाऊबंदांबरोबर केलेला
करार स्मरले नाहींत; १० तर मी सोराच्या तटावर
अग्नि पाठवीन, तो त्याचे महाल जाळून फस्त करील.
११ परमेश्वर म्हणतो, अदोमाचे तीन काय पण
चार अपराध झाले, म्हणून मी शासन करण्यापासून
माघार घेणार नाहीं; त्यानें तरवार घेऊन आपल्या
बंधूचा पाठलाग केला, त्यानें आपला कळवळा दाबून
टाकिला; तो आपल्या क्रोधानें एकसारखा तडफडत
राहिला; त्यानें आपला संताप सतत ठेविला;
१२ यामुळें मी तेमानावर अग्नि पाठवीन, तो बस्राचे
महाल जाळून फस्त करील.
१३ परमेश्वर म्हणतो, अम्मोन वंशजांचे तीन काय
पण चार अपराध झाले, म्हणून मी शासन करण्यापासून
माघार घेणार नाहीं; कारण त्यांनीं आपली सीमा वाढवि-
ण्यासाठीं गिलादाच्या गरोदर स्त्रियांना चिरिलें; १४ तर
मी राब्बाच्या तटाला अग्नि लावीन, वधाच्या दिवशीं
रणशब्द होत असतां व वावटळीच्या दिवशीं तुफान
होत असतां तो तिचे महाल जाळून फस्त करील;
१५ आणि त्यांचा राजा व त्याच्याबरोबर त्याचे सरदार
बंदिवान होऊन जातील असें परमेश्वर म्हणतो.

२ १ परमेश्वर म्हणतो, मवाबाचे तीन काय पण
चार अपराध झाले, म्हणून मी शासन करण्यापासून
माघार घेणार नाहीं; कारण त्यानें अदोमाच्या राजाचीं
हाडें भाजून त्यांचा चुना केला; २ त्यामुळें मी मवाबावर
अग्नि पाठवीन, तो करीयोथाचे महाल जाळून फस्त
करील व त्या दंगलींत रणशब्द व शिंगांचा आवाज होत
असतां, मवाब नष्ट होईल; ३ मी त्याच्यांतल्या शास्त्यास
कापून टाकीन, व त्याच्याबरोबर त्याच्या सर्व सरदारांस
मारून टाकीन, असें परमेश्वर म्हणतो.
४ परमेश्वर म्हणतो, यहूदाचे तीन काय पण
चार अपराध झाले, म्हणून मी शासन करण्यापासून माघार
घेणार नाहीं; कारण त्यांनीं परमेश्वराचें धर्मशास्त्र धिक्का-
रिलें आहे, त्यांनीं त्याचे विधि पाळिले नाहींत; व त्यांचे
वाडवडील ज्या खोट्या गोष्टींस अनुसरले त्यांच्या योगें ते
बहकले आहेत; ५ त्यामुळें मी यहूदावर अग्नि पाठ-
वीन, तो यरुशलेमाचे महाल जाळून फस्त करील.
६ परमेश्वर म्हणतो, इस्राएलाचे तीन काय पण चार
अपराध झाले, म्हणून मी शासन करण्यापासून माघार
घेणार नाहीं; कारण ते रुप्यासाठीं धार्मिकास विकतात,
एका जोड्यासाठीं गरिबास विकतात; ७ गरिबांचीं मस्तकें
धुळींत लोळवितात, ते दीनांच्या मार्गांत आडवे येतात;
माझ्या पवित्र नामास बट्टा लावण्याकरितां मुलगा व
बाप एकाच तरुणीकडे जातात. ८ गहाण घेतलेलीं वस्त्रें
घालून ते प्रत्येक वेदीजवळ निजतात आणि आपल्या
दैवतांच्या[1] मंदिरांत घेतलेल्या दंडाचा द्राक्षारस प्राशन
करितात.
९ मीं तर त्यांच्यापुढून अमोरी लोकांचा संहार केला;
त्यांची उंची गंधसरूंच्या उंचीसारखी होती. ते अल्लोन
झाडांसारखे मजबूत होते; मीं वरून त्यांचें फळ व खालून
त्यांचें मूळ नासविलें. १० मीं तुम्हांस अमोरी लोकांच्या
देशाचें वतन देण्यास मिसर देशांतून आणिलें व चाळीस
वर्षें रानांतून फिरविलें. ११ तुमच्या पुत्रांतील कांहींना
संदेष्टे होण्यासाठीं व तुमच्या तरुणांतील कांहींना
नाजीर होण्यासाठीं मीं वाढविलें, इस्राएल वंशजहो, असें
नव्हे काय, असें परमेश्वर म्हणतो. १२ तरी पण तुम्हीं
नाजीरांस द्राक्षारस पाजिला व संदेष्ट्यांस संदेश देऊं
नका अशी आज्ञा केली.
१३ यामुळें पाहा, धान्याच्या पेंढ्यांनीं गच्च भरलेला
गाडा जसा खालीं दबतो तसें मी तुम्हांला दाबीन. १४
जो चपळ त्यास पलायन साधावयाचें नाहीं, बळकट
आहे त्यास आपली शक्ति चालवितां यावयाची नाहीं,
वीरास आपला जीव वांचवितां येणार नाहीं; १५ धनुर्धा-
र्‍याला उभें राहतां येणार नाहीं; चपळ पायांच्या इसमाला
आपला बचाव करतां येणार नाहीं; घोडेस्वारास
आपला जीव वांचवितां येणार नाहीं; १६ वीरांपैकीं महा-
धैर्यवानहि त्या दिवशीं उघडाबोडका पळून जाईल, असें
परमेश्वर म्हणतो.

१ अथवा : देवाच्या

३ १ इस्राएलवंशजहो, तुम्हांविरुद्ध म्हणजे जें सर्व
कुळ मीं मिसर देशांतून बाहेर आणिलें त्याच्या-
विरुद्ध परमेश्वरानें सांगितलेलें वचन ऐका, तें असें:
२ भूतळावरील सर्व कुळांत केवळ तुमच्याबरोबरच मीं
परिचय केला; म्हणून तुमच्या सर्व दुष्कृत्यांबद्दल
मी तुमची झडती घेईन. ३ पूर्वसंकेत केल्याशिवाय
दोघे जण एकमेकांबरोबर चालतील काय? ४ पारध
नसल्यास वनांत सिंह गर्जना करितो काय? कांहीं
धरिलें नसल्यास तरुण सिंह आपल्या गुहेंत गुरगुरतो
काय? ५ पाशच मांडिला नसल्यास पक्षी जमिनी-
वरल्या जाळ्यांत अडकेल काय? जाळ्यांत कांहीं
अडकलें नसल्यास तें जमिनीवरून वर उडेल काय?
६ नगरांत रणशिंग वाजविल्यास लोक घाबरावयाचे
नाहींत काय? नगरावर विपत्ति आली असून ती
परमेश्वरानें आणिली नाहीं असें होईल काय? ७ प्रभु
परमेश्वर आपलें रहस्य आपले सेवक संदेष्टे यांस कळ-
विल्याशिवाय खरोखर कांहींच करीत नाहीं. ८ सिंहानें
गर्जना केली आहे; त्याला भिणार नाहीं असा कोण?
प्रभु परमेश्वर बोलला आहे; संदेश दिल्यावांचून
कोणाच्यानें राहवेल?

९ अश्दोदांतील महालांतून व मिसर देशांतील
महालांतून असें जाहीर करून सांगा: शोमरोनच्या
डोंगरांवर जमा व्हा; त्यामध्यें केवढी दंगल चालली आहे
ती पाहा, त्यांच्यांत काय जुलूम होत आहे तो पाहा.
१० परमेश्वराचें असें म्हणणें आहे कीं हे जे आपल्या
महालांत बलात्कार व विध्वंस यांच्यायोगें धनसंचय
करितात त्यांस सरळ आचरण करण्याचें ठाऊक नाहीं.
११ ह्यास्तव प्रभु परमेश्वर म्हणतो, तो पाहा शत्रु!
तो देश घेणार! तो तुझें बल हरण करणार व
तुझे महाल लुटणार! १२ परमेश्वर म्हणतो, जसा
मेंढपाळ सिंहाच्या तोंडांतून दोन तंगड्या अथवा
कानाचा एकादा तुकडा बचावितो तसे पलंगाच्या
कोपऱ्यांत रेशमी गादीवर बसणारे इस्राएलाचे वंशज
आपला जीव वांचवितील.

१३ हें ऐका, व याकोबाच्या घराण्याविरुद्ध प्रतिज्ञापूर्वक
सांगा: प्रभु परमेश्वर सेनाधीश देव म्हणतो, १४ ज्या दिवशीं
इस्राएलाच्या घराण्याचा त्यांच्या अपराधांबद्दल मी समाचार
घेईन तेव्हां बेथेलाच्या वेद्यांचा समाचार घेईन;
वेदीचीं शिंगें तोडिलीं जाऊन तीं भूमीवर पडतील.
१५ हिंवाळ्याचा महाल उन्हाळ्याच्या महालावर आद-
ळून पाडीन, हस्तिदंतानें मढविलेलीं घरें नष्ट होतील,
बहुत घरें नाहींतशीं होतील, असें परमेश्वर म्हणतो.

४ १ शोमरोन डोंगरावर असणाऱ्या बाशानाच्या
गाईंनो, ज्या तुम्ही दीनांस नाडितां, गरिबांस
ठेचितां व आपल्या धन्यांस म्हणतां, आणा,
आम्हांस पिऊं द्या, त्या तुम्ही हें वचन ऐका: २ प्रभु
परमेश्वरानें आपल्या पवित्रतेची शपथ वाहून म्हटलें,
पाहा, असे दिवस येत आहेत कीं तुम्हांस आकड्यांनीं
ओढून नेतील; शिल्लक राहिलेल्यांस मासे धरण्याच्या
गळांनीं ओढून नेतील. ३ एकीपुढें एक अशा तुम्ही
तटाच्या भगदाडांतून नीट बाहेर चालत्या व्हाल व
हर्मोनांत जाऊन पडाल, असें परमेश्वर म्हणतो.

४ बेथेलास जाऊन पातक करा, गिल्गालास
जाऊन पातकाची वृद्धि करा; प्रतिदिवशीं सकाळीं
आपले यज्ञ अर्पा, दर तीन दिवसांनीं आपले दशमांश
आणा; ५ खमीर घातलेल्या भाकरींचीं अर्पणें
ईशोपकारस्मरणासाठीं होमरूपें अर्पा; स्वसंतोषानें केलेल्या
अर्पणांचा पुकारा करा; तीं सर्वांस ऐकवा;
इस्राएल वंशजहो, तुम्हांस हें आवडतें असें प्रभु
परमेश्वर म्हणतो.

६ मीं तर तुम्हांस तुमच्या सर्व नगरांत दांतांची
स्वच्छता दिली, व तुमच्या सर्व स्थलीं भाकरीची वाण
पाडिली तरी तुम्ही मजकडे वळलां नाहीं असें परमेश्वर
म्हणतो. ७ कापणीला अद्यापि तीन महिने आहेत तोंच
पाऊस तुम्हांकडे जाऊं नये म्हणून मीं तो आवरून धरिला;
तो एका नगरावर पडावा, एकावर पडूं नये, असें मीं
केलें; एका शेतावर पाऊस पडला, एका शेतावर पडला
नाहीं; तें सुकून गेलें. ८ दोन तीन गांव पाणी पिण्यासाठीं
एका गांवांत पडतझडत गेले, त्यांची तृप्ति झाली नाहीं;

तरी तुम्ही मजकडे वळलां नाहीं असें परमेश्वर म्हणतो.
९ तांबेरा व भेरड ह्यांच्यायोगें मीं तुमचें ताडण केलें;
तुमचे बाग, तुमचे द्राक्षीचे मळे, तुमचीं अंजिरांचीं
झाडें व तुमचीं जैतून झाडें, कुरतुडणाऱ्या टोळांनीं खाऊन
टाकिलीं; तरी तुम्ही मजकडे वळलां नाहीं असें परमेश्वर
म्हणतो. १० मिसर देशांतल्याप्रमाणें मीं तुमच्यांत मरी
पाठविली; तुमचे तरुण पुरुष तुमच्या घोड्यांसह मीं
तरवारीनें वधिले आहेत; तुमच्या छावण्यांतील दुर्गंध थेट
तुमच्या नाकांत जाईसें मीं केलें; तरी तुम्ही मजकडे
वळलां नाहीं, असें परमेश्वर म्हणतो. ११ देवानें सदोम
व गमोरा यांचा नाश केला तसा तुमच्यांतल्या कांहीं
जनांचा केला आहे; तुम्ही अग्नींतून काढिलेल्या
कोलितासारखे झालां; तरी तुम्ही मजकडे वळलां नाहीं,
असें परमेश्वर म्हणतो.

१२ ह्यास्तव हे इस्राएला, मी तुला असेंच करीन; मी तुला
असेंच करीन, म्हणून हे इस्राएला, आपल्या देवासमोर येण्यास
सिद्ध ऐस. १३ कारण जो पर्वत निर्माण करितो, वारा उत्पन्न
करितो, मनुष्याच्या मनांतील विचार काय आहेत
याची त्याला जाणीव करून देतो, जो प्रभात अंध-
कारमय करितो आणि पृथ्वीच्या उच्च स्थलांवर चालतो
त्याचें नाम परमेश्वर, सेनाधीश देव, हें आहे.

५ १ हे इस्राएलाच्या घराण्या, हें जें विलापवचन
मी तुम्हांविरुद्ध उच्चारितों तें ऐका. २ इस्राएल-
कुमारी पडली आहे; ती पुनः उठावयाची नाहीं;
तिला आपल्या भूमीवर टाकून दिलें आहे; तिला उठविणारा
कोणी नाहीं. ३ कारण प्रभु परमेश्वर म्हणतो,
ज्या नगरांतून हजार निघत तेथें शंभर व ज्यांतून
शंभर निघत तेथें दहा, असे इस्राएलाच्या घराण्यांत
उरतील.

४ कारण परमेश्वर इस्राएलाच्या घराण्यास म्हणतो,
मला शरण या म्हणजे वांचाल; ५ परंतु बेथेलास शरण
जाऊं नका, गिल्गालांत प्रवेश करूं नका, पलीकडे
बैरशेब्यास जाऊं नका; कारण गिल्गाल खात्रीनें बंदिवासांत
जाईल, व बेथेल शून्यवत् होईल. ६ परमेश्वरास शरण जा,
म्हणजे वांचाल; नाहींतर तो योसेफाच्या घराण्यावर
अग्नीसारखा पडून त्याला खाऊन टाकील; त्याला विझवि-
णारा बेथेलांत कोणी असणार नाहीं. ७ न्यायाचा कडू
दवणा करणारे व धार्मिकता धुळीस मिळविणारे लोकहो,
८ ज्यानें कृत्तिका व मृगशीर्ष हीं नक्षत्रें केलीं, जो निबिड
अंधकाराची प्रभात करितो व दिवसाची काळोखी रात्र
करितो, जो समुद्राच्या जलांस बोलावून पृथ्वीच्या पाठीवर
ओतितो, त्याचें नाम परमेश्वर हें होय. ९ तोच बलवानांस
एकाएकीं नाशाप्रत नेतो, म्हणजे मग दुर्गांचा विध्वंस
होतो.

१० वेशींत हितबोध करणाऱ्याचा ते द्वेष करितात,
सात्विकपणें बोलणाऱ्याचा वीट मानितात. ११ तुम्ही
गरिबास तुडवितां व भेट म्हणून त्याच्यापासून धान्य उप-
टतां, यामुळें तुम्हीं जीं चिऱ्यांचीं घरें बांधिलीं आहेत
त्यांत तुम्ही राहणार नाहीं, तुम्हीं जे द्राक्षीचे रमणीय मळे
लाविले आहेत त्यांचा द्राक्षारस पिणार नाहीं. १२ कारण
तुमचे अपराध किती आहेत व तुमचीं पातकें किती घोर
आहेत हें मला ठाऊक आहे; तुम्ही धार्मिकाला
जाचितां, तुम्ही लाच घेतां व वेशींत दरिद्र्यांचा न्याय
बुडवितां. १३ ह्यास्तव जो शहाणा असेल तो
अशा वेळीं मौन धरील, कारण दिवस वाईट
आहेत.

१४ तुम्ही वांचावें म्हणून बऱ्याच्या मागें लागा;
वाइटाच्यामागें लागूं नका, म्हणजे तुम्ही म्हणतां
त्याप्रमाणें परमेश्वर, सेनाधीश देव, तुम्हांबरोबर असेल.
१५ वाइटाचा द्वेष करा, बऱ्याची आवड धरा, वेशींत
न्याय स्थापीत करा; परमेश्वर सेनाधीश देव योसेफाच्या
अवशेषावर कदाचित् दया करील. १६ ह्यास्तव परमेश्वर
सेनाधीश देव, प्रभु, म्हणतो, प्रत्येक चवाठ्यावर शोक
होईल, गल्लयागल्लयांतून लोक हायहाय म्हणतील; ते शोक
करावयास शेतकऱ्यास बोलावितील व विलापगीत म्हण-
ण्यांत जे चतुर त्यांस आक्रंदन करण्यास बोलावितील.
१७ द्राक्षीच्या प्रत्येक मळ्यांत आक्रंदन होईल, कारण
मी तुमच्यामधून जाईन असें परमेश्वर म्हणतो.

१८ परमेश्वराचा दिवस यावा अशी जे इच्छा बाळगतात,
त्यांस धिक्कार असो ! परमेश्वराचा दिवस येण्याची तुम्ही कां

इच्छा करितां ? तो अंधकारमय आहे, प्रकाशमय नव्हे.
१९ एकादा मनुष्य सिंहापासून पळतो तों त्याला
अस्वल गांठितें, तो घरांत येऊन भिंतीला हात
टेंकतो तों त्याला सर्प दंश करितो, तसा हा प्रकार
आहे. २० परमेश्वराचा दिवस अंधकारमय असणार,
प्रकाशमय नसणार, तो अगदीं काळोखाचा असणार;
त्यांत मुळींच चमक नसणार असें नव्हे का ?
२१ तुमच्या उत्सवांचा मला तिटकारा आहे, मी ते
तुच्छ मानितों; तुमच्या पवित्र मेळ्यांचा वासहि
मला खपत नाहीं. २२ तुम्हीं मला होम व अन्नार्पणें
अर्पिलीं तरी त्यांत मला कांहीं संतोष नाहीं; तुमच्या
पुष्ट पशूंच्या शांत्यर्पणांकडे मी ढुंकून पाहणार नाहीं.
२३ तुमच्या गाण्याचा गोंगाट मजपासून दूर न्या,
तुमच्या वीणांचें वादन मी ऐकणार नाहीं. २४ न्याय
पाण्याप्रमाणें व धार्मिकता प्रचंड लोंढ्याप्रमाणें वाहो.
२५ हे इस्राएलाच्या घराण्या, तुम्ही रानांत चाळीस
वर्षें मला पशुयज्ञ व अन्नार्पणें अर्पीत होतां काय ?
२६ तुम्ही आपल्या राजाचा मंडप, आपल्या मूर्तींचा
देव्हारा व तुम्हीं केलेला आपल्या देवाचा तारा हीं
तुम्ही वाहून न्याल; २७ आणि मी तुम्हांस दिमिष्काच्या
पलीकडे बंदिवान करून नेईन, असें परमेश्वर म्हणतो;
सेनाधीश देव हें त्याचें नाम आहे.

६ १ सीयोनांत सुखवस्तु असणारे व शोमरोनाच्या
पर्वतावर निश्चिंत असणारे यांस धिक्कार असो !
प्रधान राष्ट्रांतल्या ज्या प्रमुखांकडे इस्राएलाचें घराणें
धाव घेतें त्यास धिक्कार असो ! २ पलीकडे कालनेस
जाऊन पाहा, व तेथून महान् हमाथास जा, पलिष्ट्यांच्या
गथास जा; ह्या राज्यांपेक्षां तीं श्रेष्ठ आहेत काय ?
त्यांचा मुलूख तुमच्या मुलखापेक्षां मोठा आहे काय ?
३ अहो तुम्ही विपत्तीच्या दिवसाचा विचार लांबणीवर
टाकितां आणि बलात्काराचें आसन जवळ आणितां;
४ तुम्ही हस्तिदंती पलंगांवर निजतां व मंचकांवर
ताणून पडतां; कळपांतलीं कोकरें व गोठ्यांतलीं वासरें
खातां. ५ तुम्ही वीणेच्या सुरावर कांहींतरी गात
असतां; दाविदाप्रमाणें अनेक तंतुवाद्यें बनवितां;
६ तुम्ही घागरींच्या घागरी द्राक्षारस पितां, उत्तम तेलांनी
आपणांस माखितां, योसेफावरील आपत्तीबद्दल तुम्ही
खेद करीत नाहीं.
७ ह्यास्तव ते आतां बंदिवानांच्या अग्रभागीं चालून
बंदिवासांत जातील, ख्यालीखुशाली करणाऱ्यांचा
गोंगाट नाहींसा होईल. ८ प्रभु परमेश्वरानें स्वतांची
शपथ वाहिली; परमेश्वर, सेनाधीश देव म्हणतो,
मी याकोबाच्या वैभवाचा तिरस्कार करितों, त्याच्या
महालांचा मी तिटकारा करितों; हें नगर व
त्यांतील सर्व मी इतरांच्या हातीं देईन. ९ मग असें
होईल कीं एका घरांत दहा मनुष्यें असलीं तरी तीं
मरतील. १० एकाद्याचा नातलग त्याला उचलण्यासाठीं
आणि त्याला जाळण्यासाठीं त्याचीं हाडें घरांतून बाहेर
नेण्यास येईल, तेव्हां तो घरांतल्या अंतर्भागीं असणा-
ऱ्यास विचारील कीं आणखी कोणी तुझ्याबरोबर आहे
काय ? तो म्हणेल, नाहीं; तेव्हां हा म्हणेल, गप्प राहा,
परमेश्वराचा नामोच्चार करावयाचा नाहीं. ११ कारण पाहा,
परमेश्वर आज्ञा करील तेव्हां मोठ्या घरांस भगदाडें
पाडण्यांत येतील आणि लहान घरांस भेगा पाडण्यांत येतील.
१२ घोडे खडकावर धावतात काय ? कोणी तेथें
बैल नेऊन नांगरितात काय ? तुम्ही तर न्यायाऐवजीं
विष व धार्मिकतेच्या फळाऐवजीं कडूदवणा केला आहे.
१३ तुम्ही अस्तित्वांत नसलेल्या गोष्टीबद्दल हर्ष करितां;
तुम्ही म्हणतां, आम्हीं आपल्या सामर्थ्यानें सत्ता संपा-
दिली नाहीं काय ? १४ परमेश्वर, सेनाधीश देव म्हणतो,
पाहा, हे इस्राएलाच्या घराण्या, मी तुम्हांवर एक राष्ट्र
उठवीन; ते हमाथाच्या सीमेपासून अराबाच्या ओहोळा-
पर्यंत तुम्हांस पीडितील.

७ १ प्रभु परमेश्वरानें मला दाखविलें, तों पाहा,
पडसाळ उगवण्याच्या सुमारास त्यानें टोळ उत्पन्न
केले; आणि पाहा, राजाकरितां कापणी झाल्या-
वर उगवलेलें तें गवत होतें. २ आणि असें झालें

१ अथवा: आपला राजा सकूथ, आपल्या कैवान मूर्ति व तुम्हीं केलेल्या आपल्या देवाचा तारा हीं तुम्ही वाहून नेत असां.

की त्यांनीं देशांतील झाडपाला खाऊन पार केला, तेव्हां
मी म्हणालों, हे प्रभू परमेश्वरा, मी विनंती करतों, क्षमा
कर, याकोबाचा कसा टिकाव लागेल? कारण तो दुर्बल
आहे. ३ तेव्हां परमेश्वराला याबद्दल अनुताप झाला व तो
म्हणाला, असें घडावयाचें नाहीं.

४ प्रभु परमेश्वरानें मला दाखविलें तों पाहा, शासन
करण्यास त्यानें अग्नीला बोलाविलें, तेव्हां त्यानें
महासागर खाऊन टाकिला व भूमिहि तो खाऊन
टाकणार होता. ५ तेव्हां मी म्हणालों, हे प्रभू परमेश्वरा,
मी विनंती करितों कीं हें थांबीव; याकोबाचा कसा
टिकाव लागेल? कारण तो दुर्बळ आहे. ६ तेव्हां परमेश्वराला
याबद्दल अनुताप झाला; प्रभु परमेश्वर म्हणाला, हेंहि
घडावयाचें नाहीं.

७ त्यानें मला दाखविलें तों पाहा, ओळंबा लावून
बांधिलेल्या भिंतीवर प्रभु उभा आहे, त्याच्या हातांत
ओळंबा आहे. ८ परमेश्वर मला म्हणाला, आमोसा,
तुला काय दिसतें? मी म्हणालों, ओळंबा; प्रभु
म्हणाला, पाहा, माझे लोक इस्राएल यांच्यामध्यें मी
ओळंबा धरितों; मी यापुढें त्यांची गय करणार नाहीं.
९ इसहाकाचीं उच्चस्थानें ओसाड होतील, इस्रा-
एलाच्या पवित्र स्थानांची नासधूस होईल आणि मी
तरवार घेऊन यराबामाच्या घराण्यावर उठेन.

१० मग बेथेल येथील याजक अमस्या यानें इस्रा-
एलाचा राजा यराबाम यास निरोप पाठविला कीं, इस्रा-
एली घराण्याच्या भरवस्तींत आमोसानें फितुरी केली
आहे, त्याचीं सर्व वचनें देशाला सहन होत नाहींत.
११ कारण आमोस म्हणतो, यराबाम तरवारीनें मरेल,
व इस्राएलास त्याच्या देशांतून खात्रीनें पकडून
नेतील. १२ मग अमस्या आमोसाला म्हणाला, अरे
द्रष्ट्या, जा, यहूदा देशांत पळून जा; तेथें संदेश
सांगून पोट भर; १३ पण बेथेलांत यापुढें संदेश सांगूं
नको; कारण हें राजाचें पवित्र स्थान, ही राजधानी
आहे.

१४ तेव्हां आमोस अमस्याला म्हणाला, मी
संदेष्टा नाहीं अगर संदेष्ट्याचा पुत्र नाहीं, तर मी गुराखी,
उंबराच्या झाडांची निगा करणारा आहें. १५ मी
कळपामागें असतां परमेश्वरानें मला निवडिलें; परमे-
श्वर मला म्हणाला, जा, माझे लोक इस्राएल यांस
संदेश सांग. १६ तर परमेश्वराचें वचन ऐक; तूं
म्हणतोस, इस्राएलाविरुद्ध संदेश सांगूं नको, इसहाकाच्या
घराण्याविरुद्ध शब्द काढूं नको; १७ यास्तव
परमेश्वर म्हणतो, कीं तुझी बायको नगरांत वेश्या होईल,
तुझे पुत्र व तुझ्या कन्या तरवारीनें पडतील. तुझी
जमीन सूत्र लावून वांटून टाकितील, तूं स्वतः अमंगळ
देशांत मरशील, आणि इस्राएलास त्याच्या देशांतून
खात्रीनें बंदिवान करून नेतील.

८ १ प्रभु परमेश्वरानें मला दाखविलें तों पाहा,
मला पक्व फळांची पाटी दिसली. २ तो म्हणाला,
आमोसा, तुला काय दिसतें? मी म्हणालों, पक्व
फळांची पाटी; मग परमेश्वर मला म्हणाला, माझे
लोक इस्राएल यांचा अंतसमय आला आहे; यापुढें
मी त्यांची गय करणार नाहीं. ३ प्रभु परमेश्वर म्हणतो,
त्या दिवशीं मंदिरांतील गीतें आक्रंदनाचीं होतील,
प्रेतांच्या राशी पडतील, सर्व ठिकाणीं तीं बाहेर फेकि-
तील; गप्प राहा!

४ जे तुम्ही दरिद्र्यांस गिळण्यासाठीं आ पसरितां व देशां-
तील दीनांस नष्ट करण्यास पाहतां ते तुम्ही हें ऐका;
५ तुम्ही म्हणतां, चंद्रदर्शन कधीं आटोपेल?
म्हणजे आम्हांस धान्य विकावयास सांपडेल, शब्बाथ
केव्हां संपेल? म्हणजे आम्ही गहूं बाहेर काढूं,
एफा लहान करूं, शेकेल मोठा करूं व खोट्या तागडीनें
फसवूं; ६ म्हणजे आम्ही रुपें देऊन दीनांस विकत
घेऊं, एक जोडा देऊन गरिबास विकत घेऊं व गव्हाची
खेर विकून काढूं. ७ परमेश्वरानें याकोबाच्या वैभवाची
शपथ वाहिली आहे कीं मी त्यांचीं कोणतींहि कर्में
खात्रीनें कधींहि विसरणार नाहीं. ८ यामुळें भूमीचा
थरकांप होणार नाहीं काय? तिजवरील प्रत्येक रहिवासी
शोक करणार नाहीं काय? तिला नील नदीप्रमाणें
पूर्णपणें पूर येईल, मिसर देशाच्या नदीप्रमाणें ती
खळबळेल व पुनः ती ओसरेल. ९ प्रभु परमेश्वर
म्हणतो, त्या समयीं असें होईल कीं मी सूर्याचा दुपारीं
अस्त करीन, निरभ्र दिवशीं पृथ्वीवर अंधार करीन.

१० तुमचे उत्सव मी शोकाचे दिवस करीन, तुमचीं
सर्व गीतें विलापरूप करीन, सर्वांच्या कंबरेस गोणताट
गुंडाळीन, सर्वांचीं डोकीं भादरून टाकीन, कोणीं एकुलत्या
एका पुत्राचा शोक करावा त्या प्रसंगासारखा तो प्रसंग
करीन आणि त्याचा शेवट क्लेशमय करीन.
११ प्रभु परमेश्वर म्हणतो, पाहा, असे दिवस येत आहेत
कीं त्यांत मी देशावर दुष्काळ आणीन; तो दुष्काळ अन्नाचा
नव्हे किंवा पाण्याचा नव्हे, तर तो परमेश्वराचीं वचनें
ऐकण्यासंबंधाचा होईल. १२ ते ह्या समुद्रापासून त्या
समुद्रापर्यंत भटकतील, उत्तरेपासून पूर्वेपर्यंत पडत-
झडत जातील; ते परमेश्वराचें वचन प्राप्त करून घेण्या-
साठीं इकडून तिकडे धावतील तरी त्यांस तें प्राप्त
व्हावयाचें नाहीं. १३ त्या समयीं सुंदर तरुणी व तरुण
तहानेनें मूर्च्छित होतील. १४ जे शोमरोन येथील
मूर्तीची शपथ घेऊन म्हणतात कीं, हे दाना, तुझ्या
देवाच्या जीविताची शपथ, बैर-शेब्याच्या यात्रेची
शपथ, ते पडतील; पुनः उठावयाचे नाहींत.
९ १ मीं प्रभूला वेदीजवळ उभें राहिलेलें पाहिलें;
तो म्हणाला, खांबांच्या माथ्यांवर प्रहार कर म्हणजे
उंबरठे हालतील; त्यांचे तुकडे करून त्या सर्वांच्या
डोक्यांवर पाड; त्यांच्यांतले शेष उरतील ते मी तर-
वारीनें वधीन; त्यांतला कोणी पळून जाऊं पाहील, पण
त्याला पळून जातां येणार नाहीं; त्यांतला कोणी
निसटून जाऊं पाहील, पण तो निभावणार नाहीं. २ ते
अधोलोक फोडून आंत उतरले तरी माझा हात त्यांस
तेथून ओढून काढील; ते वर स्वर्गांत चढले तरी तेथून
मी त्यांस खालीं ओढून आणीन. ३ ते कर्मेलाच्या
माथ्यावर लपून राहिले तरी मी त्यांचा सुगावा लावीन
व तेथून त्यांस ओढून आणीन; ते समुद्राच्या तळीं
माझ्या दृष्टीआड लपून राहिले तरी मी तेथें सर्पास आज्ञा
करीन म्हणजे तो त्यांस डसेल; ४ आणि ते शत्रूंपुढें
पाडाव होऊन गेले असले तरी तेथें मी तरवारीस आज्ञा
करीन म्हणजे ती त्यांस वधील; मी त्यांच्याकडे दृष्टि
लावीन, ती त्यांच्या वाइटासाठीं असेल, बऱ्यासाठीं नव्हे.
५ कारण प्रभु, सेनाधीश परमेश्वर, यानें भूमीला
हात लावतांच ती विरघळते आणि तिजवरील सर्व रहि-
वासी शोक करितात; तिला नील नदीप्रमाणें पूर्ण-
पणें पूर येईल, मिसर देशच्या नदीप्रमाणें ती पुन
ओसरेल. ६ तो आकाशांत आपल्या मंदिराचे मजले
उभारितो, पृथ्वीवर त्यानें आपला नभोमंडप स्थापिला
आहे, तो समुद्राच्या पाण्यास बोलावून तें पृथ्वीच्या
पाठीवर ओतितो; त्याचें नाम परमेश्वर आहे.
७ इस्राएल वंशजहो, तुम्ही मला कुशाच्या वंशजांसारखे
नाहीं काय, असें परमेश्वर म्हणतो. मीं इस्राएल लोकांस
मिसर देशांतून, पलिष्टी लोकांस कफतोरांतून आणि
अरामी लोकांस कीरांतून आणिलें नाहीं काय? ८ पाहा,
प्रभु परमेश्वराचा डोळा या पापिष्ट राज्यावर आहे; मी
तें पृथ्वीच्या पाठीवरून नष्ट करीन; याकोबाचें घराणें
मात्र मी समूळ नष्ट करणार नाहीं, असें परमेश्वर म्हणतो.
९ कारण पाहा, धान्य चाळणीनें चाळितात आणि एक
लहानसा दाणाहि जमिनीवर पडत नाहीं, तसें मी आज्ञा
करून इस्राएलाच्या घराण्यास सर्व राष्ट्रांतून चाळून
घेईन. १० माझ्या लोकांतले जे सर्व पापी जन, आम्हांस
अनिष्ट गांठणार नाहीं, तें आम्हांवर येणार नाहीं, असें
म्हणतात ते तरवारीनें मरतील.
११ दाविदाचा पडलेला डेरा त्या दिवशीं मी
उभारीन व त्याचीं भगदाडें बुजवीन; त्याचें जें कोस-
ळलें आहे तें मी उभारीन; तो पूर्वकालीं होता तसा
तो बनवीन; १२ मग ते अदोमाच्या अवशेषाचा व
ज्यांस माझें नांव ठेविलें आहे त्या सर्व राष्ट्रांचा ताबा
घेतील, असें हें कृत्य करणारा परमेश्वर म्हणतो.
१३ पाहा, परमेश्वर म्हणतो, असे दिवस येत आहेत कीं
नांगरणारा कापणी करणाऱ्याला गांठील व द्राक्षें
तुडविणारा बीं पेरणाऱ्यास गांठील; डोंगरांवरून नवा
द्राक्षारस वाहील व सर्व टेकड्यांना पाझर फुटतील.
१४ मी आपल्या इस्राएल लोकांचा बंदिवास पालटीन; ते
ओसाड झालेलीं नगरें बांधितील व त्यांत वस्ती करितील;
ते द्राक्षीचे मळे लावितील व त्यांचा द्राक्षारस पितील; ते
बाग लावितील व त्यांचीं फळें खातील. १५ मी त्यांस
त्यांच्या भूमींत रुजवीन व जी भूमि मीं त्यांस दिली
आहे तींतून त्यांस यापुढें उपटून टाकण्यांत येणार
नाहीं, असें परमेश्वर तुझा देव म्हणतो.

# ओबद्या

१ ओबद्याला झालेला दृष्टांत:
अदोमाविषयीं प्रभु परमेश्वरानें हें म्हटलें: परमे-
श्वरापासून आम्हीं हें वर्तमान ऐकलें आहे; एक
जासूद राष्ट्रांमध्यें पाठविलेला आहे; तो म्हणतो, उठा,
आपण त्यांजबरोबर लढावयास जाऊं. २ पाहा, मीं तुला
राष्ट्रांमध्यें क्षुद्र केलें आहे; तुला फार तुच्छ मानितात.
३ खडकाच्या कपारींत उंच स्थानीं वसणाऱ्या, तूं
आपल्या मनांत समजतोस कीं मला खालीं जमिनीवर
कोण पाडणार? या तुझ्या मनाच्या अभिमानानें तुला
दगा दिला आहे. ४ तूं गरुडाप्रमाणें आपलें घरटें उंच
केलें, तुझें घरटें ताऱ्यांमध्यें बांधिलें, तरी मी तुला तेथून
ओढून खालीं पाडीन, असें परमेश्वर म्हणतो. ५ तुज-
वर चोर आले, रात्रीं लुटारू आले, तर त्यांस हवें
तेवढेंच ते घेतील, नाहीं काय? द्राक्षें खुडणारे तुजकडे
आले, तर ते सरवा नाहींत का ठेवणार? पण तुझी तर
किती नासाडी झाली आहे! ६ एसावाची मालमत्ता कशी
धुंडाळून काढण्यांत आली आहे! त्याचे गुप्त निधि कसे
हुडकण्यांत आले आहेत! ७ तुजबरोबर करारमदार केले-
ल्यांनीं तुला सीमेवर लावून दिलें आहे; तुजबरोबर सल्ला
केलेल्यांनीं तुला फसविलें आहे, ते तुजवर प्रबल झाले
आहेत. तुझें अन्न खाणाऱ्यांनीं तुझ्यासाठीं जाळें
पसरिलें आहे; अदोमांत समज मुळींच नाहीं. ८ मी
अदोमांतून सुज्ञ पुरुष नाहींतसे करीन, एसावाच्या
पहाडांतून बुद्धि नाहींशी करीन, असें त्या काळीं नाहीं
का घडणार, असें परमेश्वर म्हणतो. ९ अरे तेमाना,
तुझे वीर कच खातील, म्हणजे प्रत्येकाचा वध होऊन
एसावाच्या पहाडांतून सर्व नष्ट होतील.

१० तूं आपला भाऊ याकोब याजवर गहजब केला
म्हणून लज्जेनें तूं व्याप्त होशील, व तुला कायमचें नष्ट करि-
तील. ११ ज्या दिवशीं तूं अलग राहिलास, ज्या दिवशीं
परके त्याची मालमत्ता घेऊन गेले, परदेश्यांनीं त्याच्या
वेशींत शिरून यरुशलेमाविषयीं चिठ्या टाकिल्या, त्या दिवशीं
तूंहि त्यांतला एक होतास. १२ तूं आपल्या भावाचा
संकटसमय व त्याच्या विपत्तीचा दिवस, पाहून संतोष मानूं
नको आणि यहूदाच्या वंशजांस नाशसमय प्राप्त झाला
असतां तुला आनंद वाटूं देऊं नको; संकटाच्या दिवशी
ताठ्यानें बोलूं नको. १३ माझ्या लोकांच्या विपत्काळी
त्यांच्या वेशींत शिरूं नको, त्यांच्या विपत्तीच्या दिवशी
त्यांचें संकट पाहून संतोष मानूं नको, त्यांच्या विप-
त्काळीं त्यांच्या मालमत्तेला हात लावूं नको. १४ त्यांच्या
पळून जाणाऱ्यांस मारून टाकण्यासाठीं चवाठ्यावर उभा
राहूं नको, संकटाच्या दिवशीं त्यांच्या निभावलेल्यांस
धरून देऊं नको.

१५ कारण परमेश्वराचा दिवस सर्व राष्ट्रांना समीप
येऊन ठेपला आहे; तूं केलें तसें तुला करितील;
तुझी करणी तुझ्याच डोक्यावर उलटेल. १६ कारण
तुम्ही जसें माझ्या पवित्र पर्वतावर प्यालां तशीं सर्व
राष्ट्रें सतत पीत राहतील; तीं पिऊन बरळतील आणि
होतीं कीं नव्हतीं अशीं होतील; १७ पण निभाव-
लेले सीयोन डोंगरावर राहतील; तो पवित्र स्थान असा
होईल; याकोबाचें घराणें आपल्या वतनाचा ताबा
घेईल. १८ याकोबाचें घराणें अग्नि होईल, योसेफाचें
घराणें ज्वाला होईल व एसावाचें घराणें धसकट होईल;
ते त्यांच्यांत पेट घेऊन त्यांस खाऊन टाकितील;
एसावाच्या घराण्यापैकीं एकहि उरणार नाहीं; कारण
परमेश्वर असें बोलला आहे.

१९ दक्षिणेंतील लोक एसावाच्या पहाडाचा ताबा
घेतील; तळवटींतले लोक पलिष्ट्यांवर सत्ता चालवितील;
ते एफ्राइमाचें क्षेत्र व शोमरोनाचें क्षेत्र ताब्यांत घेतील
व बन्यामीन गिलादाचा ताबा घेईल. २० इस्राएल-
वंशजांच्या या सैन्यांतले बंदिवान झालेले लोक कनान्यांचें
सारफथापर्यंतचें वतन ताब्यांत घेतील; आणि यरुश-
लेमांतून बंदिवान करून सफारदांत नेण्यांत आलेले
लोक दक्षिणेंतल्या नगरांचा ताबा घेतील. २१ एसावा-
च्या पहाडाचा न्याय करावयाला उद्धारकर्ते सीयोन
डोंगरावर येतील; आणि राज्य परमेश्वराचें होईल.

# योना



१ अमित्तयाचा पुत्र योना याला परमेश्वराचें
१ वचन प्राप्त झालें कीं २ ऊठ, त्या मोठ्या निनवे
शहरास जा व त्याच्याविरुद्ध आरोळी कर; कारण
त्याची दुष्टता मजपुढें आली आहे; ३ पण परमेश्वराच्या
दृष्टीआड व्हावें म्हणून योना तार्शीसास पळून जाण्यास
निघाला. तो याफोस गेला, तेथे त्याला तार्शीसास जाणारें
जहाज आढळलें; त्यानें त्याचा उतार दिला व परमे-
श्वराच्या दृष्टीआड व्हावें म्हणून त्यांच्याबरोबर तार्शीसास
निघून जावयासाठीं तो जहाजांत जाऊन बसला.
४ तेव्हां परमेश्वरानें समुद्रांत प्रचंड वायु सोडिला
आणि समुद्रांत असें मोठें तुफान झालें कीं जहाज फुट-
ण्याच्या लागास आलें. ५ खलाशी घाबरले व आपआपल्या
दैवतांचा धावा करूं लागले; मग त्यांनीं जहाज हलकें
करण्यासाठीं त्यांतील माल समुद्रांत फेकून दिला. योना
तर जहाजाच्या तळाशीं जाऊन गाढ झोप घेत पडला
होता. ६ तेव्हां जहाजाचा तांडेल त्याच्याजवळ येऊन
म्हणाला, अरे, झोप घेत काय पडलास? ऊठ, आपल्या
देवाचा धावा कर, न जाणों तो देव आपल्याकडे लक्ष
देईल, म्हणजे आपला नाश व्हावयाचा नाहीं. ७ त्यांनीं
एकमेकांस म्हटलें, चला आपण चिठ्या टाकूं म्हणजे
कोणामुळें हें संकट आपणांवर ओढवलें हें आपणांस
कळेल. त्यांनीं चिठ्या टाकिल्या तेव्हां योनाच्या नांवाची
चिठी निघाली. ८ त्यांनीं त्याला विचारिलें, कोणामुळें हें
संकट आम्हांवर आलें सांग; तुझा धंदा काय? तूं
आलास कोठून? तुझा देश कोणता? तूं कोणत्या लोकां-
पैकीं आहेस? ९ तो त्यांस म्हणाला, मी इब्री आहें;
ज्या स्वर्गीच्या देवानें समुद्र व कोरडी भूमि निर्माण
केली त्या परमेश्वराचा मी उपासक आहें. १० तेव्हां
त्या माणसांस अत्यंत भीति वाटली; ते त्याला म्हणाले,
तूं हें काय केलें? तो परमेश्वरासमोरून पळून चाललेला
आहे हें त्यांस कळलें, कारण त्यानें त्यांस तसें सांगि-
तलें होतें.
११ ते त्याला विचारूं लागले कीं समुद्र आमच्या-
साठीं शांत व्हावा म्हणून आम्हीं तुझें काय करावें?
समुद्र तर अधिकाधिक खवळत होता. १२ तो
त्यांस म्हणाला, मला उचलून समुद्रांत फेकून द्या
म्हणजे तुमच्यासाठीं समुद्र शांत होईल; कारण माझ्या-
मुळें हें मोठें वादळ तुम्हांवर उठलें आहे हें मला पक्कें
ठाऊक आहे. १३ जहाज किनाऱ्याला लावावें म्हणून
तीं माणसें वल्हीं मारमारून थकलीं, पण त्यांस तें साधेना,
कारण समुद्र त्यांजवर अधिकाधिक खवळत चालला
होता. १४ तेव्हां ते परमेश्वराचा धावा करून म्हणाले,
हे परमेश्वरा, आम्ही तुला विनंति करितों कीं या
माणसाच्या जिवामुळें आम्हांस मारूं नको व निर्दोष
जीव घेतल्याचा दोष आम्हांवर आणूं नको; कारण तूं
परमेश्वर आहेस, तुला इष्ट दिसतें तें तूं करितोस. १५ मग
त्यांनीं योनाला धरून समुद्रांत फेकून दिलें, तेव्हां
समुद्र खवळावयाचा राहिला. १६ त्या माणसांस तर
परमेश्वराचा फार धाक पडला; त्यांनीं परमेश्वराला यज्ञ
केला व नवसहि केले.
१७ परमेश्वरानें योनाला गिळण्यास एक प्रचंड मत्स्य
सिद्ध केला होता; योना त्या मत्स्याच्या पोटांत तीन दिवस
व तीन रात्री होता.

१ मत्स्याच्या पोटांतून योनानें आपला देव परमे-
२ श्वर याची प्रार्थना केली; २ तो म्हणाला, मीं आपल्या
संकटावस्थेंत परमेश्वराचा धावा केला, तेव्हां त्यानें
माझें ऐकलें;
अधोलोकाच्या उदरांतून मीं आरोळी केली;
तेव्हां तूं माझा शब्द ऐकला.
३ तूं मला डोहांत, समुद्राच्या पोटांत टाकिलें,
प्रवाहानें मला व्यापिलें;
तुझ्या सर्व लाटा व कल्लोळ मजवरून गेले.
४ मी म्हणालों, तुझ्या दृष्टीवेगळें मला
फेकून दिलें आहे;

तरी तुझ्या पवित्र मंदिराकडे
मी पुनः डोळे लावीन.
५ जलांनीं मला प्राण जाईपर्यंत व्यापिलें;
डोहानें चोहोंकडून मला घेरिलें;
समुद्रांतील शेवाळीनें माझें डोकें वेष्टिलें.
६ मी खालीं पर्वतांच्या तळीं गेलों होतों;
पृथ्वीच्या अडसरांनीं मला कायमचें कोंडून टाकिलें
होतें; तरी परमेश्वरा, माझ्या देवा, तूं गर्तेतून माझा
जीव उद्धरिला आहे.
७ माझा जीव माझ्या ठायीं व्याकुळ झाला तेव्हां मीं
परमेश्वराचें स्मरण केलें;
माझी प्रार्थना तुझ्या पवित्र मंदिरांत
तुझ्याजवळ पोहचली.
८ जे निरर्थक मूर्तींना भजतात,
ते आपल्या दयाघनास सोडून देतात;
९ पण मी तुला आभारप्रदर्शनाचे यज्ञ करीन;
मीं केलेले नवस फेडीन.
तारण परमेश्वरापासून होतें.
१० परमेश्वरानें मत्स्यास आज्ञा केली तेव्हां त्यानें
योनास कोरड्या भूमीवर ओकून टाकिलें.

१ परमेश्वराचें वचन दुसऱ्यानें योनाला प्राप्त
३ झालें कीं, २ ऊठ; त्या मोठ्या निनवे शहरास जा
व मी तुला सांगेन तो संदेश त्यास आरोळी करून
सांग. ३ तेव्हां योना उठून परमेश्वराच्या वचनाप्रमाणें
निनवेस गेला. निनवे हें देवाच्या दृष्टीनें मोठें शहर होतें,
तें सगळें फिरून येण्यास तीन दिवस लागत. ४ योना
त्यांतून एक दिवसाची वाट चालत असतां ओरडत गेला
कीं चाळीस दिवसांचा अवकाश आहे, मग निनवे धुळीस
मिळेल.
५ तेव्हां निनवेंतील लोकांनीं देवावर श्रद्धा
ठेविली, त्यांनीं उपास नेमिला आणि श्रेष्ठापासून
कनिष्ठापर्यंत सर्व गोणताट नेसले. ६ निनवेच्या राजास
हें वर्तमान समजलें तेव्हां तो आपल्या आसनावरून
उठला व आपल्या अंगांतला झगा काढून गोणताट
नेसून राखेंत बसला. ७ त्यानें जाहीरनामा काढून
आपला व आपल्या सरदारांचा असा ठराव
निनवेभर प्रसिद्ध केला कीं कोणी माणसानें, पशूनें,
गुरांढोरांनीं व शेरडांमेंढरांनीं कांहीं चाखूं नये, खाऊं
नये, पाणी पिऊं नये. ८ तर मनुष्यानें व पशूनें
गोणताट नेसावें, देवाचा मोठ्यानें धावा करावा आणि
प्रत्येकानें आपल्या कुमार्गापासून, आपल्या हाताच्या
जुलमापासून मागें फिरावें. ९ देव कदाचित् वळेल व
अनुताप पावेल आणि आपल्या संतप्त क्रोधापासून
परावृत्त होईल, म्हणजे आपला नाश होणार नाहीं.
१० देवानें त्यांचें वर्तन पाहिलें, म्हणजे अर्थात् ते
आपल्या कुमार्गापासून वळले आहेत हें पाहिलें; तेव्हां
त्यांच्यावर अरिष्ट आणीन असें जें तो म्हणाला होता
त्याविषयीं तो अनुताप पावला आणि त्यानें त्यांजवर तें
आणिलें नाहीं. १ योनाला ह्यावरून फार वाईट वाटलें व
त्याला राग आला. २ तो परमेश्वराला विनंति करूं
४ लागला कीं हे परमेश्वरा, मी आपल्या देशांत होतों
तेव्हां हें माझें म्हणणें होतें कीं नाहीं ! म्हणूनच मीं
तार्शीशास पळून जाण्याची त्वरा केली. मला ठाऊक होतें कीं
तूं कृपाळू, कनवाळू, मंदक्रोध, दयासंपन्न, अरिष्ट आणिल्या-
बद्दल अनुताप करून घेणारा असा देव आहेस. ३ तर
आतां, हे परमेश्वरा, माझी विनंति ऐक, माझा प्राण घे,
कारण जगण्यापेक्षां मला मरणें बरें वाटतें. ४ तेव्हां परमे-
श्वर म्हणाला, तुला क्रोध येणें हें बरें काय ? ५ मग योना
बाहेर जाऊन शहराच्या पूर्वेस बसला; तेथें त्यानें एक
मांडव घातला आणि शहराचें काय होतें तें पाहत त्याच्या
छायेस बसला.
६ परमेश्वर देवानें तुंबीचा एक वेल उगविला, आणि
तो वाढून त्याची छाया योनाच्या डोक्यावर यावी व त्यानें
पीडेंतून मुक्त व्हावें असें केलें. या तुंबीमुळें योनाला
फार आनंद झाला; ७ पण दुसरा दिवस उजाडला तों
देवानें एक किडा उत्पन्न केला; तो त्या तुंबीला लागला
तेव्हां ती सुकून गेली. ८ मग असें झालें कीं सूर्योदय
झाल्यावर देवानें पूर्वेचा झळईचा वारा वाहविला; तेव्हां
ऊन योनाच्या डोक्याला लागलें; त्यानें तो मूर्च्छित झाला
व आपणाला मृत्यु येवो, अशी विनवणी करून
तो म्हणाला, मला जगण्यापेक्षां मरणें बरें वाटतें !
९ तेव्हां देव योनाला म्हणाला, तुंबीवरून तूं रागावें

हें बरें काय? तो म्हणाला, रागामुळें माझा प्राण गेला
तरी पुरवलें. १० परमेश्वर म्हणाला, या तुंबीसाठीं
तुला कांहीं श्रम पडले नाहींत, तूं हिला वाढविलें नाहीं,
ही एका रात्रींत वर आली व एका रात्रींत मेली, हिची
तूं इतकी पर्वा करितोस! ११ तर उजव्याडाव्या
हाताचा भेद ज्यांस कळत नाहीं अशीं एक लाख वीस
हजारांहून अधिक माणसें व पुष्कळशीं गुरेंढोरें ज्या मोठ्या
निनवे शहरांत आहेत, त्यांची मीं पर्वा करूं नये काय?

# मीखा



१ यहूदाचे राजे योथाम, आहाज व हिज्कीया
१ यांच्या कारकीर्दीत मीखा मोरष्टी याला परमेश्वराचें
वचन प्राप्त झालें; शोमरोन व यरुशलेम यांविषयीं
त्यानें जें पाहिलें तें हें:
२ सर्व राष्ट्रांनो, तुम्ही ऐका; अगे पृथ्वी, तूं व
तुजवरील सर्व वस्तुजात यांनीं कान द्यावा; प्रभु
परमेश्वर, आपल्या पवित्र मंदिरांतून प्रभु तुमच्याविरुद्ध
साक्ष देवो, ३ कारण पाहा, परमेश्वर आपल्या स्थानाहून
येतो, खालीं उतरतो, व पृथ्वीच्या उच्च स्थलांवर चालत
जातो. ४ अग्नीपुढें मेण वितळतें अथवा उतरणीवर
ओतलेलें पाणी वाहतें तसें पर्वत त्याच्या खालीं विर-
घळतात, व खोरीं फाटतात. ५ याकोबाच्या अपराधामुळें,
इस्राएली घराण्याच्या पातकांमुळें हें सर्व होतें. याकोबाचा
अपराध कोणता? शोमरोन नव्हे काय? यहूदाचीं
उच्चस्थानें कोणतीं? यरुशलेम नव्हे काय? ६ ह्यामुळें
मी शोमरोनास शेतांतील दगडांच्या ढिगारासारखें
करीन; तिला द्राक्षीच्या मळ्यासारखें करीन; मी तिचे
दगड खोऱ्यांत फेकून देईन, तिचे पाये उघडे करीन.
७ तिच्या सर्व कोरींव मूर्तींचे फोडून तुकडे करण्यांत
येतील; तिच्या व्यभिचाराची सर्व कमाई अग्नीनें जाळण्यांत
येईल; तिच्या सर्व मूर्तींची मी नासधूस करीन; वेश्येच्या
कमाईनें तिनें त्या मिळविल्या म्हणून वेश्येची कमाई
अशा त्या पुनरपि होतील.
८ यास्तव मी शोक व आक्रंदन करीन, मी उघडा-
नागवा फिरेन, मी कोल्ह्यांसारखा ओरडेन व शहा-
मृगांसारखा विवळेन. ९ कारण तिच्या जखमा असाध्य
आहेत; हें अरिष्ट यहूदापर्यंत आलें आहे, माझ्या
लोकांच्या वेशीपर्यंत, यरुशलेमापर्यंत आलें आहे.
१० गथांत हें कळवूं नका, मुळींच रडूं नका; बेथल-
अफ्रांत (धुळीच्या गृहांत) मी धुळींत लोळलों.
११ शाफीरच्या (सुंदर नगराच्या) रहिवाशिणी, नग्न
होऊन, लज्जा सोडून चालती हो; सअनानाची रहि-
वाशीण बाहेर निघाली नाहीं; बेथ-एसलाचा शोक हा
तुमच्या विपत्तीचा शेवट नाहीं. १२ कारण परमेश्वरा-
पासून यरुशलेमाच्या वेशीवर संकट आलें म्हणून
मारोथाची रहिवाशीण कल्याण होण्याच्या उत्कंठेनें
स्फुरण पावत आहे. १३ लाखीशाच्या रहिवाशिणी,
रथास वेगवान् घोडे जोड; सीयोनकन्येच्या पापाचा आरंभ
तिजपासून झाला; कारण इस्राएलाचे अपराध तुझ्या
ठायीं आढळले; १४ म्हणून तुला मोरेशेथ-गथ सोडून
जातांना देणगी द्यावी लागेल; अकजीबाचीं घरें इस्रा-
एलाच्या राजांस फसविणारीं होतील; १५ मोरेशेच्या
रहिवाशिणी, मी तुला दुसरा वतनदार आणीन;
इस्राएलाचें गौरव अदुल्लामास येईल. १६ तूं आपलें
डोकें भादर, तुझ्या लाडक्या मुलांमुळें केसांचें
वपन कर, गिधाप्रमाणें आपल्या डोक्याचें टक्कल
वाढीव; कारण तीं बंदिवान होऊन तुजपासून गेलीं
आहेत.

१ जे अनर्थाचा संकल्प करितात व बिछान्या-
२ वर पडल्यापडल्या दुष्टतेची योजना करितात
त्यांस धिक्कार असो! सकाळ उजाडतांच ते आपला
बेत सिद्धीस नेतात, कारण हें करण्याचें सामर्थ्य
त्यांच्या हातीं आहे. २ ते शेतांचा लोभ धरून तीं
हरण करितात, घरांचा लोभ धरून तीं हस्तगत करितात;
असें ते माणसावर व त्याच्या घरावर, माणसावर व
त्याच्या वतनावर बलात्कार करितात; ३ म्हणून परमे-
श्वर म्हणतो, पाहा, या वंशाचें अनिष्ट मी योजीत
आहें; त्याच्या जोखडाखालून तुम्हांस आपली मान
काढितां येणार नाहीं, तुम्हांस मान वर करून चालतां
येणार नाहीं; कारण प्रसंग वाईट आहे. ४ त्या
दिवसांत लोक तुम्हांस उद्देशून बोलतील, विवळून शोक
करितील व म्हणतील, सर्व आटोपलें, आमचा
अगदीं समूळ नाश झाला; त्यानें माझ्या लोकांचा वांटा
परक्यांच्या स्वाधीन केला आहे; तो मजपासून कसा
काढून घेतला आहे! आमचें क्षेत्र फितुऱ्यांस त्यानें
वांटून दिलें आहे. ५ ह्यामुळें चिठी टाकून सूत्रानें
जमीन मापण्यास परमेश्वराच्या मंडळींत तुजमध्यें
कोणी राहावयाचा नाहीं.

६ ते एकसारखे बकत असून लोकांस म्हणतात बकूं
नका; त्यांनीं असल्या गोष्टींविषयीं बकूं नये; त्यांचें दोष
देणें थांबत नाहीं. ७ ज्यांना याकोबाच्या घराण्यांतले
म्हणतात, ते तुम्ही लोकहो, परमेश्वराचा आत्मा कमी
सहनशील आहे काय? हें त्याचें करणें आहे काय?
माझीं वचनें सरळपणें वर्तन करणाऱ्यांचें बरें
करीत नाहींत काय? ८ तरी पण अलीकडे माझे
लोक शत्रूसारखे उठले; जे युद्धप्रिय नसून सहजगत्या
जवळून जातात, त्यांचा वस्त्रांवरून घातलेला झगा तुम्ही
ओढून घेतां. ९ तुम्ही माझ्या लोकांच्या स्त्रिया त्यांच्या
सुखधामांतून घालवितां, त्यांच्या मुलांपासून माझें वैभव
कायमचें हरण करितां. १० उठा, चालते व्हा, हें तुमचें
विश्रांतिस्थान नव्हे; कारण अशुद्धतेनें नाश, समूळ नाश,
होईल. ११ वायफळ व खोट्या चालीचा कोणी मनुष्य
खोटें बोलून म्हणेल कीं द्राक्षारस व मद्य यांचें मी भाकीत
करीन, तर तो या लोकांचा संदेष्टा होईल.

१२ हे याकोबा, मी तुम्हां सर्वांना निश्चयें एकत्र
करीन, इस्राएलाचे अवशेष मी निश्चयें जमा करीन;
मी त्यांस बस्राच्या मेंढरांप्रमाणें एकत्र करीन, लोक-
समुदाय मोठा असल्यामुळें कुरणांमधल्या कळपाप्रमाणें
ते गजबजतील. १३ फोडतोड करणारा त्यांच्यापुढें
चालला आहे; ते फोडून वेशींतून पार निघून गेले;
त्यांचा राजा त्यांच्यापुढें चालत आहे व परमेश्वर
त्यांच्या अग्रभागीं आहे.

१ मी म्हणालों, याकोबाच्या प्रमुखांनो, इस्राएल
३ घराण्याच्या सरदारांनो, ऐका, न्यायाची जाणीव
तुम्हांला नसावी काय? २ तुम्ही बऱ्याचा द्वेष
करितां व वाईटाची आवड धरितां; तुम्ही लोकांचें
कातडें सोलून काढितां व त्यांच्या हाडांवरच्या मांसाचे
लचके तोडितां; ३ तुम्ही माझ्या लोकांचें मांस खातां.
ते त्यांजवरचें कातडें सोलून काढितात, बहुगुण्यांत टाकि-
लेल्या किंवा कढईंत असलेल्या मांसाच्या तुकड्यांप्रमाणें
ते त्यांचीं हाडें मोडून तुकडे तुकडे करितात. ४ त्या
समयीं ते परमेश्वराला आरोळी मारतील तरी तो त्यांचें
ऐकावयाचा नाहीं; तो त्या समयीं त्यांना पराङ्मुख
होईल, कारण त्यांनीं दुष्कृत्यें केलीं आहेत.

५ जे संदेष्टे माझ्या लोकांस बहकवितात, कांहीं
चावावयास मिळालें तर कल्याण असो, असें जे म्हणतात,
व ज्यापासून त्यांस चावावयास मिळत नाहीं त्याबरोबर
लढण्याची जे तयारी करितात, त्यांच्याविषयीं परमेश्वर
असें म्हणतो: ६ तुम्हांवर रात्र गुदरून तुम्हांस दृष्टांत
होणार नाहीं; तुम्हांवर अंधार पडून तुम्हांस भविष्य सांगतां
येणार नाहीं; संदेष्ट्यांस सूर्य मावळेल, त्यांस दिवसा
काळोख होईल. ७ द्रष्टे लज्जित होतील, दैवज्ञ फजीत
होतील; ते सर्व आपली दाढी झाकितील, कारण देवाकडून
कांहीं उत्तर मिळणार नाहीं. ८ मी तर याकोबास त्याचा
अपराध आणि इस्राएलास त्याचें पाप दाखवावयास खरोखर
परमेश्वराच्या आत्म्यानें, सामर्थ्यानें, न्यायानें व बळानें
पूर्ण आहें.

९ याकोब घराण्यांतील प्रमुखहो, इस्राएल

घराण्याचे सरदारहो, जे तुम्ही न्यायाचा अव्हेर
करितां व नीट आहे त्यास वाकवितां ते तुम्ही हें ऐका.
१० तुम्हीं रक्तपात करून सीयोन व दुष्टाई करून यरुश-
लेम बांधितां. ११ तिचे प्रमुख लाच खाऊन न्याय
करितात, तिचे याजक वेतन घेऊन धर्मशिक्षण देतात,
तिचे संदेष्टे पैसे घेऊन भविष्य सांगतात; तरी ते
परमेश्वरावर अवलंबून म्हणतात कीं परमेश्वर आमच्या
ठायीं नाहीं काय? आम्हांवर कांहीं अनिष्ट येणार नाहीं;
१२ म्हणून तुमच्यामुळें सीयोन शेताप्रमाणें नांगरितील,
यरुशलेम नासधुशीचा ढीग होईल व मंदिराचा पर्वत
जंगलानें भरलेला उंचवटा होईल.

४ १ शेवटल्या दिवसांत असें होईल कीं परमे-
श्वराच्या मंदिराचा डोंगर पर्वतांच्या माथ्यावर
स्थापण्यांत येईल आणि सर्व डोंगरांहून तो उंच
होऊन त्याकडे राष्ट्रें लोटतील. २ देशोदेशींच्या
लोकांच्या झुंडींच्या झुंडी जातील व म्हणतील, चला,
आपण परमेश्वराच्या पर्वतावर, याकोबाच्या देवाच्या
मंदिराकडे चढून जाऊं; तो आम्हांस आपले मार्ग
शिकवो म्हणजे आम्ही त्याच्या पथांनीं चालूं; कारण
सीयोनांतून शिक्षण व यरुशलेमांतून परमेश्वराचें वचन
निघेल. ३ तो देशोदेशींच्या बहुत लोकांचा न्याय
करील, दूर असलेल्या बलवान् राष्ट्रांचा इनसाफ ठरवील,
तेव्हां ते आपल्या तरवारी मोडून त्यांचे फाळ करितील,
आपल्या भाल्यांच्या कोयत्या करतील; यापुढें एक राष्ट्र
दुसऱ्या राष्ट्रावर तरवार उचलणार नाहीं; ते इतःपर
युद्धकला शिकणार नाहींत. ४ ते सगळे आपापल्या
द्राक्षीखालीं व अंजिराच्या झाडाखालीं बसतील, कोणी
त्यांस घाबरविणार नाहीं; कारण सेनाधीश परमेश्वराच्या
तोंडची ही वाणी आहे. ५ सर्व राष्ट्रें आपापल्या
दैवतांच्या नांवानें चालत आहेत; पण आम्ही परमेश्वर
आमचा देव याच्या नांवानें सदासर्वकाळ चालूं.

६ परमेश्वर म्हणतो, त्या दिवसांत मी लंगड्यांस
जमा करीन; हाकून दिलेल्यांस व मीं ज्यांस पीडिलें
त्यांस एकत्र करीन. ७ मी लंगड्यांस अवशेष
म्हणून ठेवीन, दूर घालविलेल्यांचें मी समर्थ राष्ट्र
करीन; आणि येथून पुढें सदासर्वकाळ परमेश्वर सीयोन
डोंगरांत त्यांजवर राज्य करील. ८ हे कळपाच्या दुर्गा[1],
सीयोनकन्येच्या डोंगरा, तुझें पूर्वीचें राज्य तुला परत
येईल, यरुशलेमाच्या कन्येला राज्य पुनः प्राप्त होईल.

९ तर तूं आतां अशी मोठ्यानें कां आक्रोश करत्येस?
तुझ्यामध्यें कोणी राजा नाहीं काय? तुझा मंत्री मेला
काय? कारण प्रसवत्या स्त्रीसारख्या तुला कळा लागल्या
आहेत. १० हे सीयोनकन्ये, तुला कांपरें भरूं दे;
प्रसूत होणाऱ्या स्त्रीप्रमाणें तुला वेदना होऊं दे; कारण
तूं आतां शहराबाहेर जाशील, शेतांत वस्ती करिशील
व बाबेलापर्यंतहि जाशील, तेथें तुझी सुटका होईल;
तेथें परमेश्वर तुला तुझ्या वैऱ्यांच्या हातून सोडवील.
११ आतां पुष्कळ राष्ट्रें तुजविरुद्ध जमा झालीं आहेत.
तीं म्हणतात, ती भ्रष्ट होवो, आमचे डोळे सीयोनेला
पाहून निवोत; १२ पण त्यांस परमेश्वराचे विचार कळत
नाहींत, त्याचे संकल्प ते समजत नाहींत; कारण खळ्या-
साठीं पेंढ्या गोळा करितात तसें त्यानें त्यांस गोळा
केलें आहे. १३ सीयोनकन्ये, ऊठ, मळणी कर; मी
तुझें शिंग लोखंडासारखें व तुझे खूर पितळेसारखे करितों;
तूं अनेक राष्ट्रांचा चुराडा करिशील; त्यांची कमाई परमे-
श्वराला वाहशील, त्यांची संपत्ति सकल पृथ्वीच्या
प्रभूला तूं वाहशील.

५ १ हे लष्कराच्या स्वामिनी[2],
तूं आपलें लष्कर आतां जमा कर, त्यानें आम्हांस वेढा
घातला आहे; ते इस्राएलाच्या नियंत्याच्या गाला-
वर सोटे मारीत आहेत.

२ हे बेथेलहेम एफ्राथा, यहूदाच्या हजारांमध्यें
तुझी गणना अल्प आहे, तरी तुजमधून एक जण
निघेल, तो मजसाठीं इस्राएलाचा शास्ता होईल; त्याचा
उद्भव प्राचीन काळापासून, अनादि काळापासून आहे.
३ यास्तव वेणा देणारी प्रसवे तोंवर देव त्यांस
परक्यांच्या अधीन करील; मग त्याचे अवशिष्ट बांधव
इस्राएलाच्या वंशजांसह परत येतील. ४ तो परमेश्वराच्या
सामर्थ्यानें, आपला देव परमेश्वर याच्या नामाच्या

१ अथवा : एदेर कोटा ( उत्पत्ति ३५:२१ पाहा )
२ मूळांत : कन्ये

प्रतापानें उभा राहील; तो कळप चारील; आणि ते
वस्ती करितील; कारण त्याची थोरवी पृथ्वीच्या
दिगंतांपर्यंत पसरेल. ५ हा पुरुष आम्हांस मूर्तिमंत
शांति होईल; जेव्हां अश्शुरी आमच्या देशांत येऊन
आमचे महाल तुडवील तेव्हां त्याजविरुद्ध आम्ही सात
मेंढपाळ व आठ लोकनायक उभे करूं. ६ ते अश्शूर
देश, व निम्रोदाच्या भूमीचे प्रवेशमार्ग तरवारीनें उद्-
ध्वस्त करतील; अश्शूर आमच्या देशांत येईल, आमच्या
सरहद्दीच्या आंत चाल करून येईल, तेव्हां तो पुरुष
त्याच्यापासून आमची सुटका करील. ७ जसें परमेश्वरा-
पासून दहिंवर येतें, व पर्जन्य गवतावर वर्षतो, आणि तीं
मनुष्यासाठीं पडण्याचा थांबत नाहीं, किंवा मानवजाती-
साठीं खोळंबून राहत नाहीं, त्याप्रमाणें याकोबाचे
अवशिष्ट लोक बहुत लोकांत पसरतील. ८ वनपशूंत
सिंह, मेंढरांत तरुण सिंह, गेला असतां तो त्यांस
तुडवून फाडितो, कोणाच्यानें त्यांचें रक्षण करवत
नाहीं, त्याप्रमाणें याकोबाचे अवशिष्ट लोक राष्ट्रांत,
बहुत लोकांत, होतील. ९ तुझा हात तुझ्या विरोध्यांवर
प्रबळ होवो, तुझे सर्व शत्रु नष्ट होवोत.

१० परमेश्वर म्हणतो, त्या काळीं असें होईल कीं
मी तुझ्याजवळ असलेले घोडे नष्ट करीन; तुझ्या
रथांचा नाश करीन; ११ तुझ्या देशांतील नगरांचा
विध्वंस करीन, तुझे सर्व दुर्ग पाडून टाकीन; १२ तुझ्या
हातचीं चेटकें मी नष्ट करीन, तुजमध्यें मांत्रिक उरणार
नाहींत; १३ तुझ्या कोरींव मूर्तींचा व स्तंभांचा तुझ्या-
मधून विध्वंस करीन; तूं यापुढें आपल्या हातच्या
कृतीच्या पायां पडणार नाहींस. १४ तुझ्यामधल्या
अशेरामूर्ति मी उपटून टाकीन; मी तुझ्या शहरांचा
नाश करीन. १५ ज्या राष्ट्रांनीं माझें ऐकलें नाहीं
त्यांची मी क्रोधानें व रागानें अशी झडती घेईन.

६ १ आतां परमेश्वर काय म्हणतो तें ऐका: ऊठ,
पर्वतांसमोर वाद कर, डोंगरांना तुझा शब्द ऐकूं दे.
२ पर्वतांनो, परमेश्वराचा वाद ऐका; पृथ्वीच्या अचल
पायांनो, तुम्हीहि ऐका; परमेश्वराचा त्याच्या लोकांबरोबर
वाद आहे; तो इस्राएलाबरोबर वाद करणार आहे. ३ हे
माझ्या प्रजे, मीं तुझें काय केलें ? मीं तुला कशानें
कंटाळविलें ? मला उत्तर दे. ४ मीं तर तुला मिसर
देशांतून बाहेर आणिलें, दास्यगृहांतून तुला सोडवून
घेतलें, मीं तुजपुढें मोशे, अहरोन व मिर्याम यांस
पाठविलें. ५ माझ्या प्रजे, मवाबाचा राजा बालाक
यानें काय मसलत केली, बौराचा पुत्र बलाम यानें त्याला
काय उत्तर केलें आणि शिट्टीम व गिल्गाल यांच्या
दरम्यान काय झालें याचें स्मरण कर, म्हणजे परमेश्व-
राचीं न्यायकृत्यें तुला समजतील.

६ मी काय घेऊन परमेश्वरासमोर येऊं ? परात्पर देवा-
समोर नमस्कार कसा घालूं ? होमबलि, एका वर्षाचीं
वासरें, घेऊन त्याजपुढें येऊं काय ? ७ हजारों एडके,
तेलाच्या दशसहस्र नद्या, यांनीं परमेश्वराला संतोष होईल
काय ? माझ्या पातकाबद्दल मी आपला ज्येष्ठ पुत्र देऊं
काय ? माझ्या जिवानें केलेल्या पापाबद्दल मी आपल्या
पोटचें फळ देऊं काय ? ८ हे मनुष्या, बरें काय तें
त्यानें तुला दाखविलें आहे; नीतीनें वागणें, आवडीनें
दया करणें व आपल्या देवासमागमें राहून नम्रभावानें
चालणें यांवांचून परमेश्वर तुजजवळ काय मागतो ?

९ परमेश्वर या नगरास हाक मारीत आहे; जो
शहाणा आहे तो तुझें नाम ओळखितो; तुम्ही दंडाचें
व तो नेमणाऱ्याचें ऐका. १० अजून दुष्टाच्या घरांत
अन्यायानें मिळविलेलें धन आहे काय ? दोषास्पद असें
उणें माप त्याच्या घरांत असतें काय ? ११ दगलबाजीची
तागडी ठेवून, खोट्या वजनांची थैली बाळगून मी
शुद्ध ठरणार काय ? १२ तेथील श्रीमंत दुष्टतेनें भरले
आहेत, तेथील रहिवासी खोटें बोलतात; त्यांची जीभ
त्यांच्या मुखांत साक्षात् कपटरूप आहे; १३ म्हणून
मी तुला हाणून भारी जखम करितों, तुझ्या पातकांमुळें
मी तुला उजाड करितों. १४ तूं खाशील पण तृप्त
होणार नाहींस; तुझ्याठायीं कंगालपणा राहील; तूं धनाची
सारासार करिशील, पण तें तुला बचावितां येणार
नाहीं; व तूं कांहीं बचाविलें तर मी तें तरवारीच्या हवालीं
करीन. १५ तूं पेरिशील पण कापणी करणार नाहींस, तूं

जैतून वृक्षांचीं फळें तुडविशील, पण त्याच्या तेलानें
अभ्यंग करणार नाहींस; द्राक्षीचा उपज तुडविशील
पण तूं द्राक्षारस पिणार नाहींस. १६ अम्रीचे कायदे
तुम्ही पाळितां, अहाबाच्या घराण्याच्या चालीरीती
तुम्ही पाळितां, व त्यांच्या तत्त्वांप्रमाणें तुम्ही चालतां,
म्हणून तुमचा नाश होईल; त्याच्या रहिवाश्यांची
निर्भर्त्सना होईल असें मी करीन; माझ्या लोकांची
अप्रतिष्ठा तुम्हांस सोसावी लागेल.

१ कोण ही माझी विपत्ति ! उन्हाळ्यांतील फळें
७ काढून घेतल्यावर जशीं झाडावर कांहीं राहतात, द्राक्षी-
च्या वेलीवर जसा सरवा राहतो, तसा मी झालों आहें;
खावयास द्राक्षांचा एक घोसहि राहिला नाहीं; माझ्या
जिवाला आवडेल असा पहिल्या बाराचा अंजीर
राहिला नाहीं. २ भक्त पृथ्वीवर नाहींसा झाला आहे;
माणसांत कोणी सरळ उरला नाहीं; ते सर्व रक्तपात
करावयास टपले आहेत, प्रत्येक जण जाळें टाकून
आपल्या भावाची पारध करितो. ३ दुष्कर्म जोरानें
करावें म्हणून ते आपले दोन्ही हात चालवितात;
सरदार फर्मावितो तें न्यायाधीश लाच घेऊन करितो;
बडा मनुष्य आपल्या मनांतील दुष्ट भाव बोलून
दाखवितो; असे ते सर्व मिळून दुष्टतेचें जाळें विणितात.
४ त्यांतला जो उत्तम तो कांटेरी झुडपासारखा आहे;
त्यांतला जो सरळ तो कांटेरी कुंपणाहून वाईट आहे;
तुझ्या टेहळणी करणाऱ्यांनीं टेहळलेला दिवस, तुझी
झडती घेण्याचा दिवस, येत आहे; आतां त्यांची त्रेधा
उडेल. ५ सोबत्याचा भरवसा धरूं नको, जिवलग मित्रा-
वर अवलंबून राहूं नको, तुझ्या उराजवळ निजणाऱ्या
तुझ्या पत्नीपासून आपलें तोंड आवरून धर. ६ कारण
पुत्र बापाला तुच्छ मानीत आहे, मुलगी आपल्या आई-
वर उठली आहे, सून आपल्या सासूवर उठली आहे;
मनुष्याच्या घरचे इसम त्याचे वैरी झाले आहेत.

७ मी तर परमेश्वराची मार्गप्रतीक्षा करीन; मी
आपल्या तारण करणाऱ्या देवाची वाट पाहत राहीन;
माझा देव माझें ऐकेल. ८ अगे माझ्या वैरिणी, माझ्या-
मुळें आनंद करूं नको; मी पडलें तरी पुनः उठेन; मी
अंधारांत बसलें तरी परमेश्वर मला प्रकाश असा होईल.
९ परमेश्वर माझा तंटा लढून माझा हक्क संपादन
करील, तोंवर मी त्याचा राग सहन करीन; कारण
मीं त्याच्याविरुद्ध पाप केलें आहे; मला तो प्रकाशांत
नेईल, मी त्याचें न्यायीपण पाहीन. १० जी मला
म्हणाली होती कीं तुझा देव परमेश्वर कोठें आहे,
ती माझी वैरीण तें पाहील, व ती लज्जेनें व्याप्त
होईल; माझे डोळे तिला पाहतील, तिला रस्त्यांतल्या
चिखलासारखें तुडवितील.

११ तुझे तट बांधण्याचा समय आला आहे ! त्या
समयीं तुझ्या सीमा रुंद होतील. १२ त्या दिवशीं
अश्शूर देशांतून, मिसर देशांतील नगरांतून, मिसर-
देशापासून फरात नदीपर्यंतच्या प्रांतांतून, दूरदूरच्या
समुद्रतीराहून व दूरदूरच्या पर्वतांवरून, लोक तुजकडे
येतील. १३ तथापि देश आपल्या रहिवाश्यांमुळें, त्यांच्या
कृत्यांच्या फळांमुळें वैराण होईल.

१४ तूं आंकडी घेऊन आपल्या लोकांस चार;
तुझ्या वतनांतील मेंढरें कर्मेलाच्या झाडींत एकांतीं
राहतात त्यांस चार; प्राचीन काळच्या दिवसांप्रमाणें
बाशानांत व गिलादांत त्यांस चारूं दे. १५ तूं मिसर
देशांतून बाहेर निघालास त्या दिवसांप्रमाणें त्याला मी
अद्भुत कृत्यें दाखवीन. १६ राष्ट्रें हें पाहतील व
आपलें एकंदर बल पाहून लज्जित होतील, ते आपल्या
तोंडावर हात ठेवितील, त्यांचे कान बहिरे होतील.
१७ ते सर्पाप्रमाणें धूळ चाटितील, पृथ्वीवरील सरपट-
णाऱ्या प्राण्यांप्रमाणें ते आपल्या विवरांतून थरथर
कांपत बाहेर येतील, परमेश्वर आमचा देव याजकडे ते
भयकंपित होऊन येतील; ते तुजपुढें भयभीत होतील.

१८ तुजसमान देव कोण आहे ? तूं अधर्माची क्षमा
करितोस, आपल्या वतनाच्या अवशेषाचे अपराध मागें
टाकितोस; तो आपला राग सर्वकाळ मनांत ठेवणार नाहीं,
कारण त्याला दया करण्यांत आनंद वाटतो. १९ तो
वळून पुनः आम्हांवर दया करील; आमचे अपराध
पायांखालीं तुडवील; तूं त्यांचीं सर्व पापें समुद्राच्या
डोहांत टाकिशील. २० प्राचीन काळापासून तूं आमच्या
वडिलांस शपथपूर्वक सांगितल्याप्रमाणें याकोबाबरोबर
सत्यतेनें व अब्राहामाबरोबर वात्सल्यानें वर्तशील.

# नहूम



**१**
१ निनवेविषयींची देववाणी: नहूम एल्कोशकर
याला प्राप्त झालेल्या दृष्टांताचें पुस्तक.
२ परमेश्वर ईर्ष्यावान् व झडती घेणारा देव
आहे; परमेश्वर सूड घेणारा व क्रोधाविष्ट आहे;
परमेश्वर आपल्या विरोध्यांचें पारिपत्य करणारा आहे;
तो आपल्या शत्रूंविषयीं मनांत क्रोध बाळगितो,
३ परमेश्वर मंदक्रोध व महापराक्रमी आहे; तरी तो
पाप्यांस शासन केल्यावांचून राहणार नाहीं; परमेश्वर
वादळांत व तुफानांत चालतो, मेघ त्याच्या चरणांची
धूळ आहेत. ४ तो समुद्रास दटावून आट-
वितो; सर्व नद्या कोरड्या करितो; बाशान व कर्मेल
त्याच्यापुढें म्लान होतात, लबानोनाचा फुलवरा कोमे-
जून जातो. ५ त्याच्यापुढें पर्वत कंपायमान होतात व
डोंगर विरघळतात; त्याच्यापुढें ही पृथ्वी, हा भूगोल व
त्यावरील सर्व रहिवासी थडथड उडतात. ६ त्याच्या
रागापुढें कोण टिकणार? त्याच्या क्रोधाच्या संतापापुढें
कोण उभा राहणार? त्याच्या संतापाचा वर्षाव
अग्नीसारखा होतो, त्याच्यापुढें खडक फुटून त्यांचे
तुकडे होतात. ७ परमेश्वर चांगला आहे, विप-
त्कालीं तो शरणदुर्ग आहे; जे त्याजवर भाव ठेवितात
त्यांस तो ओळखितो. ८ तो महापुरानें निनवेच्या
स्थानाचा नायनाट करील व तो आपल्या शत्रूंचा
पाठलाग करून त्यांस अंधारांत उधळून लावील.
९ [१]परमेश्वराविषयीं तुम्हांला काय वाटतें? तो पुरापुरा
अंत करील; विपत्ति दुसऱ्यानें येणें नकोच. १० ते गुंता-
गुंत झालेल्या कांटेऱ्यांसारखे असले, ते द्राक्षारसानें मस्त
झालेल्यांप्रमाणें असले तरी ते वाळलेल्या धसकटा-
प्रमाणें भस्म होतील. ११ परमेश्वराविरुद्ध दुष्ट संकल्प
करणारा व अनिष्ट योजणारा असा एक तुझ्यांतून
निघाला आहे. १२ परमेश्वर म्हणतो, ते मजबूत व
असंख्य असले तरी त्यांचा उच्छेद होऊन ते नाहींतसे
होतील. मीं तुला पीडिलें, पण आतां पुढें पीडणार
नाहीं. १३ आतां मी तुजवरील त्याचें जूं मोडीन, तुझी
बंधनें तोडून टाकीन.
१४ परमेश्वरानें तुजबद्दल अशी आज्ञा केली आहे की
तुझ्या बीजाची पुनः पेरणी होणार नाहीं; तुझ्या दैव-
तांच्या मंदिरांतून कोरींव व ओतींव मूर्ति मी नष्ट करीन;
मी तुझी कबर तयार करीन, कारण तूं हलका ठरला आहेस.
१५ शुभसंदेश आणणारा, शांति जाहीर करणारा
असा जो त्याचे पाय पर्वतांवर पाहा! हे यहूदा, आपले
सण पाळ, आपले नवस फेड, कारण यापुढें तुझ्यामधून
दुष्ट पुरुष येणारजाणार नाहीं; त्याचा समूळ उच्छेद
झाला आहे.

**२**
१ चुराडा करणारा तुझ्यासमोर चढाई करून
आला आहे; कोटाचें संरक्षण कर, मार्गाची टेहळणी
कर, आपली कंबर कसून आपल्या सगळ्या बळानें
सज्ज हो. २ कारण परमेश्वर याकोबाचें ऐश्वर्य इस्रा-
एलाच्या ऐश्वर्याप्रमाणें पुनः स्थापीत आहे; लुटारूंनीं
त्यांस लुटिलें आहे, त्यांच्या द्राक्षींची नासधूस केली
आहे. ३ त्याच्या वीरांची ढाल तांबडी आहे; लढवय्ये
किरमिजी पोषाख ल्याले आहेत; सज्ज होण्याच्या
दिवशीं त्याच्या रथांचें पोलाद अग्नीसारखें चमकत
आहे; ते भाले इकडूनतिकडे परजीत आहेत. ४ रस्त्यां-
तून रथ बेफाम चालले आहेत, मैदानांवर ते एकमेकां-
वर आदळत आहेत, ते मशालींसारखे दिसत आहेत,
ते विजेसारखे धावत आहेत. ५ तो आपल्या
सरदारांची पाहणी करीत आहे, ते वाटेनें ठोकरा
खात आहेत, ते उतावळीनें तटाकडे जात आहेत, तेथें
मोर्चा उभारिला आहे. ६ नदीकडील दरवाजे खुले
केले आहेत; राजवाडा कोसळला आहे. ७ [१]हुस्सब उघडी
झाली आहे, तिला नागवून धरून नेलें आहे;
तिच्या दासी पारव्यांसारख्या घुमत आहेत व आपली

१ **अथवा:** तुम्ही परमेश्वराविरुद्ध काय योजना करितां?

१ **अथवा:** निर्णय होऊन चुकला आहे.

उरें बडवून आक्रांत करीत आहेत.
८ निनवे पूर्वीपासून पाण्याच्या तळ्यासारखी होती;
तरी आतां ते पळून जात आहेत; थांबा हो थांबा, असें
ओरडतात, पण कोणी मागें वळून पाहत नाहीं. ९ चांदी
लुटा ! सोनें लुटा ! सर्व तऱ्हेच्या शोभिवंत वस्तूंचा अमर्याद
संग्रह आहे. १० ती रिकामी, शून्य व ओसाड झाली आहे;
तिच्या हृदयाचें पाणीपाणी झालें आहे, तिचे गुडघे लट-
पटत आहेत; सर्वांच्या कंबरेंत कळा निघत आहेत, त्या
सर्वांचे चेहरे फिक्के पडले आहेत. ११ सिंहांची गुहा
कोठें आहे ? तरुण सिंहांची खुराक खाण्याची जागा कोठें
आहे ? जेथें सिंह, सिंहीण व सिंहाचा पेटा हीं फिरत
असत व कोणी त्यांस भेवडावीत नसे तें ठिकाण कोठें
आहे ? १२ सिंह आपल्या पेट्यांसाठीं पुरेसें भक्ष्य फाडीत
असे, आपल्या सिंहिणींसाठीं सावजाचा गळा दाबीत असे,
तो भक्ष्यानें आपल्या गुहा, शिकारीनें आपल्या गुंफा
भरीत असे. १३ पाहा, मी तुजवर चालून येत आहें
असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो; मी तिचे रथ जाळीन,
त्यांचा धूर निघेल, तुझ्या तरुण सिंहांस तरवार फस्त
करील; मी पृथ्वीवरून तुझें भक्ष्य नाहींसें करीन, तुझ्या
जासुदांचा शब्द यापुढें ऐकूं येणार नाहीं.

३ १ रक्तपाती नगरीला धिक्कार असो ! कपट व
खून यांनीं ती भरली आहे, तिचें भक्ष्य मिळविणें
थांबत नाहीं. २ चाबकाचा फटकारा, चाकांचा घडघडाट
यांचा शब्द होत आहे; घोडे भरधाव पळत आहेत, रथ
उसळत आहेत; ३ घोडेस्वारांची दौड, तरवारीची चमक,
भाल्याचें विजेसारखें चकाकणें होत आहे; वधिलेल्यांचा
समुदाय, मृतांचा ढीग, पडला आहे; मढ्यांचा हिशेबच
नाहीं; लोक त्यांच्या मढ्यांवर ठोकर खातात. ४ सुरूप
व चेटकांत निपुण अशा त्या वेश्येच्या बहुत व्यभिचा-
रांमुळें हें घडलें आहे; ती आपल्या व्यभिचारांनीं राष्ट्रांचा,
आपल्या चेटकांनीं वंशांचा, विक्रय करिते. ५ पाहा, मी
तुजवर चालून येत आहें असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो;
मी तुझें नेसण तुझ्या तोंडावर उडवून देईन; राष्ट्रांस तुझी
नग्नता दाखवीन, राज्यांस तुझी लाज दाखवीन. ६ तुझ्यावर
केरकचरा फेकून तुला तुच्छ करीन, तुला उपहासविषय करीन; ७
आणि असें होईल कीं जो कोणी तुला पाहील तो तुजपासून
पळ काढील आणि म्हणेल, निनवे उजाड झाली आहे;
तिजसाठीं कोण शोक करील ? तुझें सांत्वन करणाऱ्यास
कोठून शोधून आणूं ?
८ नोआमोनापेक्षां तूं श्रेष्ठ आहेस काय ? ती नील
नदीच्या फाट्यांमध्यें वसली होती, तिच्यासभोवतीं पाणी
होतें; नील नदी तिचा दुर्ग होती, पाणी हाच तिचा कोट
होता. ९ कूशी व मिसरी यांचें तिला बल होतें, व तें
अमर्याद होतें; पूटी व लूबी यांची तिला कुमक होती.
१० तरी ती हद्दपार झाली, तिला बंदिवान करून नेण्यांत
आलें; तिचीं मुलें रस्त्यांच्या सर्व चवाठ्यांवर आपटून
मारण्यांत आलीं; तिच्या सरदारांवर चिठ्या टाकण्यांत
आल्या, तिच्या सर्व महाजनांस सांखळ्यांनीं बांधण्यांत
आलें. ११ तूंहि झोकांड्या खाशील, तूं लपशील, तूं
शत्रूपासून आश्रयाचें स्थान शोधिशील. १२ पहिल्या
बाराच्या पिकलेल्या अंजिरांच्या झाडाप्रमाणें तुझे सर्व
दुर्ग होतील; झाडें हालविलीं म्हणजे अंजीर खाणाऱ्याच्या
तोंडीं पडतात. १३ पाहा, तुझ्यांत राहणारे लोक केवळ
स्त्रिया आहेत; तुझ्या देशाचे दरवाजे तुझ्या शत्रूंना
खुले झाले आहेत; अग्नीनें तुझे अडसर खाऊन टाकिले
आहेत. १४ वेढा पडणार म्हणून पाणी भरून ठेव,
तुझे किल्ले मजबूत कर, चिखलांत उतर, पायांनीं गारा
तुडीव, विटाळें हातीं घे. १५ तेथें तुला विस्तव खाईल,
तुला तरवार नष्ट करील; ती तुला चाटून खाणाऱ्या
टोळांप्रमाणें खाऊन फस्त करील; चाटून खाणाऱ्या
टोळांप्रमाणें आपली संख्या वाढीव; झुंडींनीं येणाऱ्या
टोळांप्रमाणें असंख्य हो. १६ आकाशांतील ताऱ्यांपेक्षां
अधिक सौदागर तूं केले आहेत, तरी चाटून खाणारे
टोळ त्यांस नागवून उडून जातील. १७ तुझे सरदार
झुंडींनीं येणाऱ्या टोळांसारखे आहेत, तुझे सेनापति
टोळांच्या झुंडीसारखे आहेत; ते थंडीच्या दिवसांत
कुंपणांत दळ धरतात व सूर्योदय होतांच उडून जातात; ते

१ मुळांत : समुद्र

कोठें गेले हें कोणास कळत नाहीं. १८ अश्शूरच्या राजा,
तुझे मेंढपाळ झोपीं गेले आहेत; तुझे सरदार स्वस्थ
पडले आहेत; तुझे लोक डोंगरावर पसरले आहेत; कोणी
त्यांस एकत्र करीत नाहीं; १९ तुझी जखम माळत
नाहीं; तुझा घाय असाध्य आहे; तुझी बातमी ऐकणारे
सर्व तुजविषयीं टाळ्या पिटतात; कारण ज्यास
तुझी दुष्टता सतत जाचली नाहीं असा कोण
आहे ?

---

# हबकूक

१ हबकूक संदेष्ट्याला दृष्टांतानें प्राप्त झालेलें
**1** देववचन :
२ हे परमेश्वरा, मी किती वेळ ओरडूं ? तूं
ऐकत नाहींस. जुलूम झाला असें मी तुला ओरडून
सांगतो तरी तूं सुटका करीत नाहींस. ३ मला अधर्म
कां पाहावयास लावितोस ? विपत्ति मला कां
दाखवितोस ? लुटालूट व जुलूम माझ्यासमोर आहेत;
कलह चालला आहे, वाद उपस्थित झाला आहे. ४
अशानें कायद्याचा अंमल ढिला पडतो, न्यायाचें कांहींएक
चालत नाहीं; दुष्ट धार्मिकास घेरून सोडितो म्हणून
न्याय विपरीत होतो.
५ राष्ट्रांनो, लक्ष देऊन पाहा व आश्चर्यचकित व्हा,
कारण तुमच्या काळीं मी एक कार्य करितों, तें तुम्हांस
सांगितलें तरी तुम्ही विश्वास धरणार नाहीं. ६ कारण,
पाहा, मी खास्द्यांची उठावणी करितों; तें उग्र व उतावळें
राष्ट्र आहे; जीं स्थलें त्यांचीं नाहींत त्यांचा ताबा घ्यावा
म्हणून ते पृथ्वीभर फिरत असतात. ७ ते दारुण व भयंकर
आहेत; त्यांचा न्याय व त्यांचें वैभव त्यांचें स्वतः-
चेंच आहे. ८ त्यांचे घोडे चित्त्यांहून वेगवान् आहेत व
संध्याकाळीं बाहेर पडणाऱ्या लांडग्यांपेक्षा क्रूर आहेत;
त्यांचे घोडेस्वार दौड करितात, त्यांचे घोडेस्वार दुरून
येतात, खाऊन टाकण्यास त्वरा करणाऱ्या गरुडासारखे
ते धावतात. ९ ते बलात्कार करण्यास सर्व मिळून
येतात; त्यांच्या तोंडांचा रोख थेट पुढें असतो; वाळूच्या
कणांप्रमाणें ते बंदिवान गोळा करितात. १० तो तर
राजांस कसपट समजतो व अधिपतींस कवडीमोल
मानितो; कोणताहि किल्ला असला तरी तो तृणवत्
गणतो; मातीचा ढीग रचून किल्ला सर करितो. ११
शेवटीं सोसाट्याचा वारा येऊन तो उडून जाईल, स्व-
पराक्रम हाच ज्याचा देव त्यावर दोष येईल.
१२ हे परमेश्वरा, माझ्या देवा, माझ्या पवित्र प्रभू,
तूं अनादि काळापासून आहेस ना ? आम्ही मरणार नाहीं.[1]
हे परमेश्वरा, तूं त्याचा न्याय नेमिला आहे; हे दुर्गा, त्याचें
शासन व्हावें म्हणून तूं त्यास स्थापिलें आहे. १३ तुझे
डोळे इतके पवित्र आहेत कीं दुष्टता तुझ्यानें पाहवत
नाहीं, अनाचाराकडे दृष्टि लाववत नाहीं, तो तूं या बेइमानी
करणाऱ्यांकडे कां पाहत राहतोस ? जो आपल्याहून
धार्मिक त्यास दुष्ट गिळून टाकितो तेव्हां तूं कां उगा
राहतोस ? १४ तूं मानवांस समुद्रांतील माशांप्रमाणें कां
केलें आहे, कोणी शास्ता नसलेल्या जीवजंतूंप्रमाणें त्यांना
कां केलें आहे ? १५ तो त्या सर्वांस गळानें उचलितो,
त्यांस आपल्या जाळ्यांत धरितो, आपला पाग टाकून
त्यांस गोळा करितो; यामुळें तो हर्षित व आनंदित होतो;
१६ तो आपल्या जाळ्यापुढें यज्ञ करितो, आपल्या
पागाला धूप दाखवितो; कारण त्यांपासून त्याला
विपुल धन व पुष्टिकारक अन्न मिळतें. १७ तर मग
तो आपलें भरलेलें जाळें रिकामें करून राष्ट्रांची कांहींएक
गय न करितां त्यांचा सतत घात करीत राहील काय ?

---

१ पाठभेद : तुला मरण नाहीं.

२ १ मी आपल्या पहाऱ्यावर उभा राहीन,
किल्ल्यावर पहारा करीन; तो मजबरोबर काय बोलेल
आणि माझ्या गाऱ्हाण्याविषयीं त्यास मला काय उत्तर
देतां येईल तें मी पाहीन. २ मग परमेश्वरानें, मला उत्तर
दिलें कीं, हा दृष्टांत लिहून काढ, पाट्यांवर ठळक लिही;
म्हणजे कोणींहि तो वाचून धावत सुटावें. ३ कारण हा
दृष्टांत नेमिलेल्या समयासाठीं आहे आणि तो शेवटास
जाण्यास आपणच नेट करीत आहे, तो फसवावयाचा
नाहीं; त्यास विलंब लागला तरी त्याची वाट पाहा; तो
येईलच, त्याला विलंब लागावयाचा नाहीं.

४ पाहा, तो गर्वानें फुगला आहे; त्याचा आत्मा
त्याच्या ठायीं सरळ नाहीं; धार्मिक तर आपल्या विश्वा-
सानें वांचेल. ५ शिवाय त्याचा द्राक्षारस दगा देणारा
आहे; तो अहंकारी मनुष्य आहे, तो घरीं टिकत नाहीं,
त्यानें अधोलोकाप्रमाणें आपली लालसा वाढविली आहे,
तो मृत्यूसारखा अतृप्त आहे, तो सर्व राष्ट्रांस आपणा-
जवळ जमा करितो, सर्व लोकांस आपल्याजवळ एकत्र
करितो. ६ हे सर्व त्याला कवन, कूटवचन लावून,
बोलणार नाहींत काय ? लोक म्हणतील, आपला
माल नव्हे त्यानें जो आपली वृद्धि करितो व गहा-
णांचा बोजा आपणावर लादून घेतो, त्याला धिक्कार
असो; असें कोठवर ? ७ तुला चावणारे एकाएकीं
उठावणी करणार नाहींत काय ? तुला छळणारे जागे
होऊन तूं त्यांची लूट होणार नाहींस काय ? ८ तूं
पुष्कळ राष्ट्रांस लुटिलें म्हणून सर्व अवशिष्ट लोक तुला
लुटतील; माणसांचा रक्तपात आणि भूमीवर, शहरावर
व त्यांतील सर्व रहिवाश्यांवर केलेला जुलूम, यामुळें असें
होईल.

९ विपत्तीच्या हातांतून आपला बचाव व्हावा म्हणून
आपलें घरटें उंच ठिकाणीं करावें, ह्या हेतूनें जो आपल्या
घराण्यासाठीं अन्यायानें नफा मिळवितो त्याला धिक्कार
असो. १० तूं बहुत राष्ट्रांस नष्ट केल्यामुळें आपल्या
घराण्यावर अप्रतिष्ठा आणिली आहे, आपल्या जिवाचा
गुन्हेगार झाला आहेस. ११ कारण भिंतीचा दगड
ओरडेल, इमारतीच्या लाकडांतील तुळई त्याला
उत्तर देईल.

१२ जो रक्तानें नगर बांधितो, अधर्मानें शहर
स्थापितो त्याला धिक्कार असो ! १३ पाहा, लोकांच्या
श्रमाची फलप्राप्ति अग्नीला भक्ष्य होते, राष्ट्रें व्यर्थ
शिणतात, हें सेनाधीश परमेश्वर याजकडून नव्हे
काय ? १४ कारण जल समुद्राला व्यापून टाकितें तशी
पृथ्वी परमेश्वराच्या प्रतापाच्या ज्ञानानें भरेल.

१५ जो आपल्या शेजाऱ्यास मद्य पाजितो त्याला
धिक्कार असो ! तूं त्यांची नग्नता पाहावी म्हणून आपला
संतप्त क्रोध त्यांत मिसळून त्याला मस्त करितोस.
१६ सन्मानानें नव्हे तर अप्रतिष्ठेनें तुझी तृप्ति
झाली, तर तूंहि पी आणि बेसुंत्यासारखा हो; परमे-
श्वराच्या उजव्या हातचा प्याला तुजकडे वळेल,
तुझ्या वैभवाची अप्रतिष्ठा होईल. १७ लबानोनावर
केलेला जुलूम तुला घेरील, जनावरांचा झालेला नाश
तुला घाबरवील; माणसांचा रक्तपात आणि भूमीवर,
शहरावर व त्यांतील सर्व रहिवाश्यांवर केलेला जुलूम
यामुळें असें होईल.

१८ कोरींव मूर्ति ही मूर्तिकारानें कोरून केली
यांत काय लाभ ? खोटा कौल देणाऱ्या ओतींव मूर्तीवर
मूर्तिकार, मुक्या मूर्ति करणारा, श्रद्धा ठेवितो यांत
काय लाभ ? १९ जो काष्ठास म्हणतो, जागा हो,
मुक्या पाषाणास म्हणतो, ऊठ, त्याला धिक्कार असो !
त्याला कांहीं शिकवितां येईल काय ? पाहा, ती मूर्ति
सोन्यारुप्यानें मढविली आहे, पण आंत पाहावें तों
जिवाचा पत्ता नाहीं. २० परमेश्वर आपल्या पवित्र
मंदिरांत आहे; सर्व धरित्री त्याजपुढें स्तब्ध राहो.

३ १ हबक्कूक संदेष्ट्याची प्रार्थना म्हणजे
क्षोभस्तोत्र :

२ हे परमेश्वरा, मी तुझी कीर्ति ऐकून
भयभीत झालों आहें.
हे परमेश्वरा, वर्षांचा क्रम चालू असतां आपल्या
कामाचें पुनर्जीवन कर;
वर्षांचा क्रम चालू असतां तें प्रगट कर;

१ अथवा : विश्वासूपणानें. २ अथवा : सावकार.

क्रोधांतहि दया स्मर.
३ देव तेमानाहून येत आहे,
पवित्र प्रभु पारानाच्या पर्वतावरून येत आहे. [सेला]
त्याचा प्रकाश आकाश व्यापितो;
त्याच्या स्तवनांनीं पृथ्वी भरली आहे.
४ त्याचें तेज प्रकाशासारखें आहे;
त्याच्या करांतून किरण निघत आहेत;
त्याचा पराक्रम तेथें गुप्त आहे.
५ मरी त्याच्यापुढें चालते,
ज्वालारूप धाम त्याच्या पायांजवळ निघते.
६ तो उभा राहिला म्हणजे पृथ्वी डळमळू लागते;
तो नजर टाकून राष्ट्रांस उधळून लावितो.
सर्वकाळचे पर्वत विदीर्ण होतात,
युगानुयुगींचे डोंगर ढासळतात;
त्याचा हा पूर्वकाळापासून प्रघात आहे.
७ कूशानचे डेरे विपत्तीनें घेरलेले मीं पाहिले;
मिद्यान देशाच्या कनाती थरथरत आहेत.
८ परमेश्वर नद्यांवर रागावला आहे काय?
नद्यांवर तुझा राग पेटला आहे काय?
तुझा क्रोध समुद्रावर खवळला आहे काय?
म्हणूनच तूं आपल्या घोड्यांवर स्वार
झालास काय?
विजयरथांवर आरूढ झालास काय?
९ तुझें धनुष्य गवसणीबाहेर निघालें आहे,
तूं आपल्या शपथपूर्वक वचनाप्रमाणें
शिक्षा केली आहे. [सेला]
तूं पृथ्वी विदारून नद्या वाहवितोस.
१० पर्वत तुला पाहून विव्हळतात;
जलप्रवाह सपाट्यानें चालला आहे,
डोह आपला शब्द उच्चारितो,
आपले हात वर करितो.
११ तुझे बाण सुटत असतां त्यांच्या प्रकाशानें,
तुझ्या झळकणाऱ्या भाल्याच्या चकाकीनें,
सूर्य व चंद्र आपल्या स्थानीं निश्चल झाले आहेत.
१२ तूं संतापून पृथ्वीवर चालतोस,
तूं आपल्या क्रोधानें राष्ट्रांस तुडवून टाकितोस.
१३ तूं आपल्या लोकांच्या सुटकेसाठीं निघाला आहेस.
आपल्या अभिषिक्ताच्या सुटकेसाठीं
निघाला आहेस;
तूं दुर्जनाचें घर पायापासून मानेपर्यंत
उघडें करितोस,
त्याच्या शिराचे आपटून तुकडे करितोस. [सेला]
१४ त्याच्या सरदारांचें शीर तूं ज्याच्यात्याच्याच
भाल्यांनीं विंधितोस;
माझा चुराडा करण्यासाठीं ते मजवर
तुफानासारखे लोटले;
गरिबास गुप्तरूपें गिळावें यांतच त्यांस
संतोष वाटतो.
१५ तूं आपले घोडे समुद्रांतून,
महाजलांच्या राशीवरून चालवितोस.

१६ मीं हें ऐकलें तों माझें काळीज थरथरलें,
त्याच्या आवाजानें माझे ओठ कांपले;
माझीं हाडें सडूं लागलीं; माझे पाय लटपटत आहेत;
ज्या दिवशीं लोकांवर हल्ला करणारा येईल
त्या संकटाच्या दिवसाची मला वाट
पाहिली पाहिजे.
१७ अंजिराचें झाड न फुललें
द्राक्षीच्या वेलीस फळ न आलें
जैतुनाचें उत्पन्न बुडालें
शेतांत धान्य न पिकलें
मेंढवाड्यांतले कळप नाहींतसे झाले,
व गोठ्यांत गुरेंढोरें न उरलीं,
१८ तरी मीं परमेश्वराच्या ठायीं हर्ष पावेन,
मला तारण देणाऱ्या देवाविषयीं मी उल्लास करीन.
१९ परमेश्वर, प्रभु, माझें सामर्थ्य आहे,
तो माझे पाय हरणाच्या पायांसारखे करितो,
तो मला माझ्या उच्च स्थानांवरून चालूं देतो.
[मुख्य गवयासाठीं, माझ्या तंतुवाद्याच्या साथीनें
गावयाचें]

# सफन्या



१ यहूदाचा राजा आमोन याचा पुत्र योशीया
1 याच्या कारकीर्दीत सफन्या बिन कूशी बिन गदल्या
बिन अमऱ्या बिन हिज्कीया याला परमेश्वराचें
वचन प्राप्त झालें तें हें :
२ मी भूपृष्ठावरून सर्व कांहीं निखालस नाहींसें करीन,
असें परमेश्वर म्हणतो. ३ मी मनुष्य व पशु नष्ट करीन;
मी आकाशांतले पक्षी, समुद्रांतले मासे, दुर्जन व त्यांचे
अडखळे नाहींतसे करीन; भूपृष्ठावरून मानव नाहींतसे
करीन, असें परमेश्वर म्हणतो. ४ मी आपला हात
यहूदावर, यरुशलेमाच्या सर्व रहिवाश्यांवर चालवीन;
या स्थलांतून बालमूर्तींचे शेष नाहींतसे करीन, आणि
मूर्तींचे पुजारी व याजक यांचें नांवहि नाहींसें करीन;
५ जे धाब्यांवर आकाशांतील सैन्याची पूजा करितात,
जे उपासक परमेश्वराची शपथ वाहतात व मिल्कोम
मूर्तीचीहि शपथ वाहतात, ६ जे परमेश्वरापासून
पराङ्मुख झाले आहेत, ज्यांनीं परमेश्वराचे चरण धरिले
नाहींत व त्याचा शोध केला नाहीं, त्यांस मी नष्ट
करीन.

७ प्रभु परमेश्वरापुढें तुम्ही मौन धरून राहा, कारण
परमेश्वराचा दिवस येऊन ठेपला आहे; परमेश्वरानें
यज्ञबलीची सिद्धता केली आहे, त्यानें आपल्या
आमंत्रितांस पवित्र केलें आहे. ८ परमेश्वराच्या
यज्ञसमयीं असें होईल कीं, सरदार, राजपुत्र व ज्या
सर्वांनीं परदेशी पोशाख चढविला आहे त्यांचा
मी समाचार घेईन. ९ त्या दिवशीं जे उंबरठ्यावरून
उडी मारून आपल्या प्रभूचा वाडा बलात्कारानें व
कपटानें भरून टाकितात त्या सर्वांचा समाचार मी घेईन.
१० त्या दिवशीं मासळीदरवाजांतून ओरडण्याचा
आवाज होईल, दुसऱ्या पेठेंतून आक्रंदन होईल व
टेकड्यांवरून मोठा धडाका उडेल, असें परमेश्वर म्हणतो.
११ मक्तेशच्या रहिवाश्यांनो, आक्रंदन करा, कारण
कनानाचे सर्व लोक नाश पावले आहेत, चांदीनें लादलेले
सर्व नाश पावले आहेत. १२ त्या समयीं असें होईल
कीं मी दिवट्या घेऊन यरुशलेमाची तपासणी करीन;
व जे खालीं गाळ असलेल्या द्राक्षारसासारखे मंदावले
आहेत आणि आपल्या मनांत म्हणतात कीं परमेश्वर बरें
करीत नाहीं व वाईटहि करीत नाहीं, त्यांचा मी समाचार
घेईन. १३ त्यांचा माल लुटीस जाईल, त्यांचीं घरें
उजाड होतील; ते घरें बांधितील पण त्यांत वसणार
नाहींत; द्राक्षीचे मळे लावितील पण त्यांचा द्राक्षारस
पिणार नाहींत.

१४ परमेश्वराचा मोठा दिवस समीप आहे; तो
येऊन ठेपला आहे, वेगानें येत आहे; ऐका! परमे-
श्वराचा दिवस! तेथें वीर दुःखानें ओरडत आहे.
१५ हा संतापाचा दिवस आहे, दुःखाचा व क्लेशाचा
दिवस आहे, विध्वंसाचा व उजाडीचा दिवस आहे,
अंधकाराचा व उदासीनतेचा दिवस आहे, अभ्रांचा व
निबिड अंधकाराचा दिवस आहे. १६ तटबंदीच्या
नगरांविरुद्ध व उंच बुरुजांविरुद्ध रणशिंगाचा व
रणशब्दाचा हा दिवस आहे. १७ मी मानवावर
संकट आणीन, ते अंधळ्यांसारखे चालतील, कारण
त्यांनीं परमेश्वराविरुद्ध पाप केलें आहे; त्यांचें रक्त
धुळीसारखें व त्यांचें मांस विष्ठेसारखें फेकितील.
१८ परमेश्वराच्या क्रोधदिवशीं त्यांच्या सोन्यारुप्यानें
त्यांचा बचाव होणार नाहीं; त्याच्या ईर्षेच्या अग्नीनें
सर्व देश भस्म होईल, कारण तो देशांतील सर्व
रहिवाश्यांचा अंत करील आणि तोहि एकाएकी करील.

१ पाठभेद: आपल्या राजाचीहि शपथ (२ शमुवेल
१२:३० टीप पाहा)

१ चुन्याच्या घाणीचें ठिकाण

२ १ हे निर्लज्ज राष्ट्रा, एकत्र हो, ताळ्यावर ये;
२ निर्णय बाहेर पडेल, दिवस भुसाप्रमाणें उडून
जाईल, परमेश्वराचा क्रोधदिन तुम्हांवर येईल
त्यापूर्वी ताळ्यावर या. ३ देशांतील सर्व नम्र जनांनो,
परमेश्वराच्या न्यायानुसार चालणाऱ्यांनो, त्याचा आश्रय
करा, धार्मिकता व नम्रता यांचें अवलंबन करा, म्हणजे
कदाचित् परमेश्वराच्या क्रोधदिनीं तुम्ही दृष्टीआड
व्हाल.

४ कारण गज्जाचें विस्मरण पडेल, अष्कलोन रान
बनेल, अश्दोदास भर दुपारीं हाकून देतील, एक्रो-
नावर नांगर फिरेल. ५ समुद्रतीरींच्या रहिवाश्यांस,
करेथी राष्ट्रास धिक्कार असो! हे कनाना, पलिष्ट्यांच्या
देशा, तुजविरुद्ध परमेश्वराचें वचन आहे! मी तुझा
असा नाश करीन कीं तुझ्यांत एकहि रहिवासी उरणार
नाहीं. ६ समुद्रतीरींच्या प्रदेशाचीं कुरणें बनतील व
त्यांत मेंढपाळांच्या गुहा व मेंढवाडे होतील. ७ तो
प्रदेश यहूदी घराण्याच्या अवशेषासाठीं होईल; तेथें
ते आपलीं मेंढरें चारितील; अष्कलोनाच्या घरांतून ते
संध्याकाळीं बिऱ्हाडास राहतील, कारण परमेश्वर
त्यांचा देव त्यांना भेट देईल व त्यांचा बंदिवास
उलटवील. ८ मवाबानें केलेली निंदा मीं ऐकली आहे,
अम्मोन वंशजांनीं केलेली निर्भर्त्सना मीं ऐकली आहे,
त्यांनीं माझ्या लोकांची निंदा केली आहे आणि
त्यांच्या सरहद्दीवर त्यांनीं आपल्या महत्त्वाचा तोरा
मिरविला आहे; ९ म्हणून सेनाधीश परमेश्वर, इस्रा-
एलाचा देव, आपल्या जीविताची शपथ वाहून म्हणतो,
मवाब सदोमासारखें निर्जन होईल, अम्मोन वंशज
गमोऱ्यासारखे होतील, खाजकुयरीचें वतन व मिठागर
हीं सर्वकाळ वैराण होतील; माझ्या लोकांचे अवशिष्ट जन
त्यांस लुटितील; माझ्या राष्ट्राचे अवशिष्ट राहिलेले लोक
त्यांचा ताबा घेतील. १० त्यांनीं सेनाधीश परमेश्वराच्या
लोकांस तुच्छ मानिलें व त्यांजवर तोरा मिरविला
म्हणून त्यांच्या गर्वाचें त्यांस हें प्रतिफळ मिळेल.
११ परमेश्वर त्यांस भयावह होईल; पृथ्वीवरच्या सर्व
दैवतांचा तो क्षय करील; तेव्हां सर्व राष्ट्रद्वीपें व
प्रत्येक जण आपआपल्या स्थानीं त्याला भजेल.

१२ अहो कुशाच्या रहिवाश्यांनो, तुम्हीहि माझ्या
तरवारीनें मराल. १३ तो उत्तरेवर आपला हात
चालवून अश्शुराचा नाश करील; निनवे वैराण राना-
प्रमाणें रुक्ष करील. १४ गुरामेंढरांचे कळप, भूतला-
वरील सर्व पशु, तिच्यामध्यें बसतील; पाणकोळी व
साळू तिच्या खांबांच्या शिरोभागीं राहतील; त्यांचें
घुमणें खिडक्यांतून ऐकूं येईल, उंबरठे ओस पडतील,
कारण त्यानें गंधसरूचें लाकूडकाम उघडें केलें आहे.
१५ हीच ती उल्लासी व निर्धास्त असलेली नगरी! ती
आपल्या मनांत म्हणत असे कीं मीच कायती आहें,
दुसरें कोणी नाहीं; ती कशी ओसाड, पशु बसण्याची
जागा झाली आहे! तिच्याजवळून जाणारा प्रत्येक जण
तिची छीथू करील व तिच्याकडे हातवारे करील.

३ १ ती बंडखोर, भ्रष्ट व बलात्कारी नगरी, तिला
धिक्कार असो! २ तिनें वचन मानिलें नाहीं, बोध
घेतला नाहीं; परमेश्वरावर श्रद्धा ठेविली नाहीं;
ती आपल्या देवासमीप आली नाहीं. ३ तिच्यांतले तिचे
सरदार गर्जना करणारे सिंह आहेत, तिचे न्यायाधीश
संध्याकाळीं बाहेर पडणारे लांडगे आहेत, ते सकाळच्यासाठीं
कांहीं शिल्लक राहूं देत नाहींत. ४ तिचे संदेष्टे बढाईखोर
व विश्वासघातकी आहेत; तिचे याजक पवित्रस्थान
भ्रष्ट करितात, त्यांनीं धर्मशास्त्राचें अतिक्रमण केलें
आहे. ५ तिच्यामध्यें परमेश्वर न्यायी आहे; तो कांहीं
अन्याय करीत नाहीं; रोज सकाळीं तो आपला न्याय
प्रकट करितो, चुकत नाहीं; अधार्मिकांस तर लाज
कशी ती ठाऊक नाहीं. ६ मीं राष्ट्रें नष्ट केलीं आहेत,
त्यांचे बुरूज उद्ध्वस्त केले आहेत; मीं त्यांचे रस्ते
उजाड केले आहेत, त्यांनीं कोणी जातयेत नाहीं;
त्यांचीं नगरें उद्ध्वस्त केलीं आहेत, कोणी माणूस,
कोणी रहिवासी, तेथें उरला नाहीं. ७ मी म्हणालों,
तिनें माझें भय मात्र धरावें, बोध घ्यावा, म्हणजे तिच्या-
संबंधानें मीं जें कांहीं ठरविलें आहे तदनुसार तिची
वस्ती नष्ट होणार नाहीं; पण त्यांनीं आपलीं सर्व दुष्कर्में
नेटानें चालविलीं.

८ परमेश्वर म्हणतो, मी लुटीसाठीं उठेन
तोंवर माझी वाट पाहा कारण राष्ट्रें एकत्र

जमवावीं, राज्यें एकत्र मिळवावीं; त्यांवर माझा क्रोध,
माझा सर्व संतप्त क्रोध पाडावा हा माझा निश्चय
आहे; कारण माझ्या ईर्ष्येच्या अग्नीनें सर्व पृथ्वी भस्म
होईल. ९ मी राष्ट्रांस शुद्ध वाणी देईन, व परमे-
श्वराची सेवा घडावी म्हणून ते सर्व त्याच्या नामाचा धावा
एकचित्तें करितील; १० कुशाच्या नद्यांपलीकडून ते
माझ्या उपासकांस आणितील, ते माझ्या पांगलेल्यांची
कन्या मला अर्पण म्हणून आणितील. ११ ज्या ज्या
बाबतींत तूं मजविरुद्ध उल्लंघन करावेंस त्याविषयीं त्या
दिवसांत तुला लज्जित होण्याचें कारण पडणार नाहीं;
कारण तेव्हां मी तुझ्या उन्नतीचा अभिमान धरणाऱ्यांस
तुझ्यांतून नाहींतसे करीन; माझ्या पवित्र पर्वतावर
तूं यापुढें तोरा मिरविणार नाहींस. १२ मी तुजमध्यें
नम्र व गरीब लोक राहूं देईन, ते परमेश्वराच्या नामावर
श्रद्धा ठेवितील. १३ इस्राएलाचे अवशिष्ट जन कांहीं
अनिष्ट करणार नाहींत, लबाडी करणार नाहींत, त्यांच्या
मुखांत कपटी जिव्हा आढळावयाची नाहीं; ते चरतील
व विश्रांति मिळवितील, कोणी त्यांस भेवडावणार नाहीं.
१४ सीयोनकन्ये, उच्च स्वरानें गा; हे इस्राएला,
जयजयकार कर; यरुशलेमकन्ये, मनःपूर्वक उल्लास व
उत्सव कर. १५ परमेश्वरानें तुझा दंड दूर केला आहे,
तुझ्या शत्रूचें निवारण केलें आहे; इस्राएलाचा राजा
परमेश्वर तुजमध्यें आहे; तुला पुनः अरिष्टाची भीति
प्राप्त होणार नाहीं. १६ त्या दिवशीं यरुशलेमास म्हण-
तील, हे सीयोना, भिऊं नको, तुझे हात गळूं देऊं
नको. १७ परमेश्वर तुझा देव, साहाय्य करणाऱ्या वीरा-
सारखा तुझ्या ठायीं आहे; तो तुजविषयीं आनंदोत्सव
करील; त्याचें प्रेम स्थिर राहील, तुजविषयीं त्याला
उल्लास वाटून तो गाईल. १८ जे तुझे लोक सणाच्या
मेळ्याची आठवण करून रडतात त्यांस मी एकत्र
मिळवीन; त्यांजवर निंदेचा भार पडला आहे. १९ पाहा,
त्या समयीं तुला पीडणाऱ्या सर्वांचा मी समाचार घेईन; जी
लंगडणारीण आहे तिला मी वचावीन, हाकून दिलेलीस
परत आणीन; अखिल पृथ्वीवर ज्यांची अप्रतिष्ठा
झाली आहे त्यांची प्रशंसा व नांवलौकिक व्हावा असें
मी करीन. २० त्या समयीं मी तुम्हांस आणून एकत्र
करीन; तुमच्या डोळ्यांदेखत तुमचा बंदिवास उलट-
वीन, तेव्हां पृथ्वीवरल्या सर्व राष्ट्रांस तुमचा लौकिक
व गौरव होईल असें मी करीन.

१ मुळांत : खांद्याला खांदा लावून करितील.

---

# हाग्गय

१ १ दारयावेश राजाच्या कारकीर्दीच्या दुसऱ्या
वर्षी, सहाव्या महिन्याच्या प्रतिपदेस यहूदाचा
प्रांताधिकारी शल्तीएल याचा पुत्र जरूब्बाबेल व
मुख्य याजक यहोसादाकाचा पुत्र यहोशवा यांस हाग्गय
संदेष्ट्याच्या द्वारें परमेश्वराचें वचन प्राप्त झालें तें हें :
२ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, हे लोक म्हणतात कीं
वेळ अजून आली नाहीं, परमेश्वराचें मंदिर बांधण्याची
वेळ अजून आली नाहीं. ३ तेव्हां परमेश्वराचें वचन,
हाग्गय संदेष्ट्याच्या द्वारें प्राप्त झालें तें असें: ४ इकडे
मंदिर ओसाड पडलें असून तुम्हीं स्वतः आपल्या
तक्तपोशीच्या घरांत राहावें असा समय आहे काय?
५ आतां सेनाधीश परमेश्वर म्हणतो, तुम्ही आपल्या
मार्गांकडे लक्ष पुरवा. ६ तुम्ही पुष्कळ पेरणी करितां पण
हातीं थोडें लागतें; तुम्ही खातां पण तृप्त होत नाहीं;
तुम्ही पितां पण तुमची तहान भागत नाहीं; तुम्ही कपडे
घालितां पण त्यांनीं तुम्हांस ऊब येत नाहीं; मजूर मजुरीनें
पैसा मिळवून जसें काय भोंक पडलेल्या पिशवीत टाकितो.
७ सेनाधीश परमेश्वर असें म्हणतो कीं तुम्ही

आपल्या मार्गांकडे लक्ष लावा. ८ डोंगरावर जाऊन
लाकडें आणा व मंदिर बांधा; त्यानें मी प्रसन्न होईन
व माझा महिमा प्रकट करीन, असें परमेश्वर म्हणतो.
९ तुम्हीं पुष्कळाची अपेक्षा केली पण हातीं
थोडें लागलें; जें तुम्हीं घरीं आणिलें त्यावर मीं फुंकर
घातला; हें कां, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.
कारण हेंच कीं माझें मंदिर ओसाड पडलें असून तुम्ही
प्रत्येक आपापल्या घरासाठीं धडपड करीत आहां;
१० म्हणून तुम्हांमुळें आकाशानें दहिंवर आवरून
धरिलें आहे, भूमीनें आपला उपज आवरून धरिला
आहे. ११ मीं देशावर अवर्षण बोलाविलें आहे;
पर्वतांवर, पिकांवर, द्राक्षारसावर, तेलावर, भूमीच्या
उपजावर, माणसांवर, पशूंवर व तुमच्या हातच्या सर्व
कमाईवर अवर्षण बोलाविलें आहे.

१२ तेव्हां शल्तीएलाचा पुत्र जरूब्बाबेल व मुख्य
याजक यहोसादाकाचा पुत्र यहोशवा यांनीं सर्व अव-
शिष्ट लोकांसह आपला देव परमेश्वर याच्या वाणीस
मान दिला, आपला देव परमेश्वर यानें पाठविलेल्या
हाग्गय संदेष्ट्याचीं वचनें मानिलीं आणि ते लोक
परमेश्वरासमोर भीतीनें वर्तू लागले. १३ मग परमे-
श्वराचा निरोप्या हाग्गय यानें परमेश्वराचा निरोप
लोकांस कळविला; तो म्हणाला, मी तुम्हांबरोबर आहें
असें परमेश्वर म्हणतो. १४ यहूदाचा प्रांताधिकारी
शल्तीएल याचा पुत्र जरूब्बाबेल, मुख्य याजक
यहोसादाक याचा पुत्र यहोशवा व सर्व अवशिष्ट लोक
यांच्या आत्म्यांस परमेश्वरानें स्फूर्ति दिली; तेव्हां ते
जाऊन आपला देव सेनाधीश परमेश्वर याचें मंदिर
बांधण्याच्या कामास लागले; १५ हें दारयावेश राजाच्या
कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षी सहाव्या महिन्याच्या
चोविसाव्या दिवशीं घडलें.

२ १ सातव्या महिन्याच्या एकविसाव्या दिवशीं
हाग्गय संदेष्ट्याच्या द्वारें परमेश्वराचें वचन प्राप्त
झालें तें असें: २ आतां यहूदाचा प्रांताधिकारी
शल्तीएल याचा पुत्र जरूब्बाबेल, मुख्य याजक यहो-
सादाक याचा पुत्र यहोशवा आणि अवशिष्ट लोक यांस
असें विचार: ३ ज्यानें या मंदिराचें पूर्वीचें वैभव
पाहिलें आहे असा तुमच्यामध्यें कोणी उरला आहे
काय? आतां त्याची काय दशा तुम्हांस दिसते? तें
शून्य झालें आहे असें तुमच्या नजरेस पडत नाहीं काय?
४ हे जरूब्बाबेला, हिम्मत धर, असें परमेश्वर म्हणतो;
हे मुख्य याजका, यहोसादाकाच्या पुत्रा यहोशवा,
हिम्मत धर; परमेश्वर म्हणतो, देशांतल्या सर्व रहि-
वाशांनो, हिम्मत धरा व कामास लागा; मी तुम्हांबरोबर
आहें असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो. ५ तुम्ही मिसर
देशांतून निघालां तेव्हां तुम्हांबरोबर केलेला करार कायम
आहे व माझा आत्मा तुमच्या ठायीं कायम आहे; तुम्ही
भिऊं नका. ६ कारण सेनाधीश परमेश्वर असें म्हणतो,
आणखी एकदा लवकरच मी आकाश व पृथ्वी,
समुद्र व कोरडी जमीन, हीं हालवून सोडीन; ७ मी सर्व
राष्ट्रांस हालवून सोडीन म्हणजे सर्व राष्ट्रांतील निवडक
वस्तु येतील; आणि मी हें मंदिर वैभवानें भरीन, असें
सेनाधीश परमेश्वर म्हणतो. ८ रुपें माझें आहे, सोनें
माझें आहे, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो. ९ या
मंदिराचें शेवटलें वैभव पहिल्यापेक्षां श्रेष्ठ होईल, असें
सेनाधीश परमेश्वर म्हणतो; मी या स्थळाला शांति
देईन, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.

१० दारयावेशाच्या कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षी
नवव्या महिन्याच्या चोविसाव्या दिवशीं हाग्गय
संदेष्ट्याच्या द्वारें परमेश्वराचें हें वचन आलें. ११ सेना-
धीश परमेश्वर असें म्हणतो, याजकांस शास्त्रार्थ विचारा
कीं १२ कोणी समर्पित मांस आपल्या वस्त्राच्या पदरांत
घेऊन जात असतां त्याच्या पदराचा भाकरीला, काल-
वणाला, द्राक्षारसाला, तेलाला किंवा इतर कोणत्याहि
अन्नाला स्पर्श झाला तर तें पवित्र होईल काय?
तेव्हां याजकांनीं 'नाहीं' असें उत्तर दिलें. १३ मग
हाग्गय म्हणाला, प्रेताचा स्पर्श झाल्यामुळें कोणी अशुद्ध
झालेला यांपैकीं कशासहि शिवला तर तें अशुद्ध
होईल ना? तेव्हां याजकांनीं 'होईल' असें उत्तर
दिलें. १४ हाग्गयानें म्हटलें, परमेश्वर म्हणतो कीं

१ अथवा: राष्ट्रांचा इष्टविषय येईल;

या लोकांची व या राष्ट्राची माझ्या दृष्टीनें अशीच
स्थिति आहे, आणि त्यांच्या हातचें प्रत्येक काम असेंच
आहे; तेथें ते जें अर्पण करितात तें अशुद्ध
आहे. १५ आजपासून मागची, म्हणजे परमेश्वराच्या
मंदिराचा दगडावर दगड रचण्यापूर्वीची, जी स्थिति
होती तिच्याकडे लक्ष पुरवा; १६ त्या सर्व दिवसांत
कोणी वीस मापें धान्याच्या राशीकडे गेला तर त्याच्या
हातीं दहा लागत; द्राक्षाकुंडांतून पन्नास पात्रें भरून
काढावयास गेला तर त्याला वीसच मिळत. १७ मीं
तुम्हांवर, तुमच्या हातच्या सर्व कामांवर तांबारा, भेरड
व गारा ह्यांचा मारा केला; तरी तुम्हांतला एकहि मज-
कडे वळला नाहीं, असें परमेश्वर म्हणतो. १८ यास्तव
आजपासून मागच्या म्हणजे नवव्या महिन्याच्या चोवि-
साव्या तारखेस परमेश्वराच्या मंदिराचा पाया घातला
त्या मागच्या, काळाकडे लक्ष पुरवा. १९ कोठारांत कांहीं
धान्य आलें आहे काय? द्राक्षालता, अंजिराचें झाड,
डाळिंब व जैतून यांस कांहीं फळ आलें नाहीं : आजच्या
दिवसापासून मी तुम्हांस आशीर्वाद देईन.

२० महिन्याच्या चोविसाव्या दिवशीं हाग्गयाला
परमेश्वराचें वचन दुसऱ्यानें प्राप्त झालें कीं २१ यहूदाचा
प्रांताधिकारी जरुब्बाबेल यास सांग: मी आकाश
व पृथ्वी हीं हालवून सोडीन; २२ मी राज्यांचें तक्त
उलथून टाकीन, राष्ट्रांच्या राज्यांचें बल नष्ट करीन;
रथ व रथी उलथून टाकीन; घोडे व त्यांवरचे स्वार
पतन पावतील, प्रत्येक आपल्या भावाच्या तरवारीनें
पडेल. २३ सेनाधीश परमेश्वर म्हणतो: त्या
दिवशीं, हे जरुब्बाबेला, शल्तीएलाच्या पुत्रा, माझ्या
सेवका, मी तुला घेऊन मुद्रेच्या अंगठीसारखें करीन
असें परमेश्वर म्हणतो; कारण मीं तुला निवडिलें आहे,
असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.

# जखऱ्या



१ दारयावेशाच्या कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षी
1 आठव्या महिन्यांत इद्दोचा पुत्र बरेख्या याचा पुत्र
जखऱ्या संदेष्टा याला परमेश्वराचें वचन प्राप्त झालें
तें हें: २ परमेश्वर तुमच्या वाडवडिलांवर फार
कोपायमान झाला; ३ म्हणून तूं त्यांस असें सांग:
सेनाधीश परमेश्वर म्हणतो: मजकडे वळा म्हणजे
मी तुम्हांकडे वळेन, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.
४ तुम्ही आपल्या पूर्वजांसारखे होऊं नका; त्यांस
पूर्वीच्या संदेष्ट्यांनीं कंठरवानें सांगितलें कीं सेनाधीश
परमेश्वर म्हणतो, आपल्या कुमार्गांपासून व आपल्या
दुष्कर्मांपासून परावृत्त व्हा; पण त्यांनीं माझें ऐकलें
नाहीं, मनावर घेतलें नाहीं, असें परमेश्वर म्हणतो.
५ तुमचे पूर्वज आतां कोठें आहेत? संदेष्टे तरी
सर्वकाळ जगतात काय? ६ असें असतां माझे सेवक
म्हणजे संदेष्टे त्यांस जीं वचनें व नियम मीं आज्ञापिले
होते त्यांनीं तुमच्या पूर्वजांस गांठलें नाहीं काय?
तेव्हां त्यांनीं वळून म्हटलें, आमचा आचार व कर्में
यांप्रमाणें आमचें करण्याचा सेनाधीश परमेश्वराचा
मानस होता त्याप्रमाणें त्यानें आमचें केलें आहे.

७ दारयावेशाच्या कारकीर्दीच्या दुसऱ्या वर्षी अक-
राव्या म्हणजे शबाट महिन्याच्या चोविसाव्या दिवशीं
इद्दोचा पुत्र बरेख्या याचा पुत्र जखऱ्या संदेष्टा याला
परमेश्वराचें वचन प्राप्त झालें तें हें: ८ मला रात्रीं दृष्टांत
झाला तो असा: एक मनुष्य तांबड्या घोड्यावर स्वार
झाला असून तळवटींतल्या मेंदीच्या झुडपांमध्यें उभा
होता; त्याच्यामागें तांबडे, सावळे व पांढरे घोडे होते.
९ मी म्हणालों, माझ्या प्रभू, हे कोण आहेत? तेव्हां
मजबरोबर भाषण करणारा दिव्यदूत म्हणाला, हे कोण
आहेत तें मी तुला दाखवितों. १० तेव्हां मेंदीच्या
झुडपांत उभें असलेल्या पुरुषानें उत्तर दिलें कीं

पृथ्वीवर फेरी करण्यासाठीं परमेश्वरानें ज्यांस पाठविलें
ते हे. ११ तेव्हां त्यांनीं मेंदीच्या झुडपांत उभें
असलेल्या परमेश्वराच्या दिव्यदूताला उत्तर दिलें कीं
आम्ही पृथ्वीतून फेरी करून आलों आहों; पाहा, सर्व
पृथ्वी स्वस्थ व शांत बसली आहे.
१२ तेव्हां परमेश्वराचा दिव्यदूत म्हणाला, हे सेनाधीश
परमेश्वरा, तूं आज सत्तर वर्षें यरुशलेम व यहूदाचीं नगरें
यांवर कोपायमान झाला आहेस; त्यांवर तूं कोठवर करुणा
करणार नाहींस? १३ तेव्हां मजबरोबर भाषण करणाऱ्या
दिव्यदूताला परमेश्वर चांगले व सांत्वनदायक शब्द
बोलला. १४ मग मजबरोबर भाषण करणारा दिव्यदूत
मला म्हणाला, असें जाहीर कर कीं सेनाधीश परमेश्वर
म्हणतो, यरुशलेम व सीयोन यांविषयीं मी अतिशयित
ईर्ष्यायुक्त झालों आहें. १५ जीं राष्ट्रें स्वस्थ आहेत त्यांवर
माझा राग फार पेटला आहे; कारण मी थोडासा
रागावलों होतों पण त्यांनीं अरिष्ट वाढविलें. १६ यास्तव
परमेश्वर म्हणतो, मी करुणायुक्त होऊन पुनः यरुश-
लेमाकडे वळत आहें; त्यांत माझें मंदिर बांधितील असें
सेनाधीश परमेश्वराचें म्हणणें आहे; यरुशलेमावर
मापनसूत्र लावितील. १७ पुनः पुकारून सांग कीं
सेनाधीश परमेश्वर म्हणतो, माझीं नगरें पुनः सुबत्तेनें
भरून जातील; परमेश्वर पुनः सीयोनाचें सांत्वन करील,
तो पुनः यरुशलेमास निवडील.
१८ मीं आपले डोळे वर करून पाहिलें तों पाहा,
चार शृंगें दृष्टीस पडलीं. १९ मजबरोबर भाषण
करणाऱ्या दिव्यदूताला मीं विचारिलें, हीं काय आहेत?
त्यानें मला म्हटलें, ज्यांमुळें यहूदा, इस्राएल व यरुशलेम हीं
परागंदा झालीं आहेत तीं हीं शृंगें. २० आणखी परमेश्वरानें
मला चार लोहार दाखविले, २१ मीं विचारिलें, यांचें
येथें काय काम? तो मला म्हणाला, ज्यांनीं यहूदास
परागंदा करून कोणास आपलें डोकें वर काढूं दिलें
नाहीं तीं हीं शृंगें आहेत; परंतु आतां त्यांस भेदरवून
सोडावें व ज्या राष्ट्रांनीं यहूदास परागंदा करण्यासाठीं
त्याच्या भूमीविरुद्ध आपलें शृंग उचलिलें त्यांचीं शृंगें
पाडून टाकावीं म्हणून हे आले आहेत.

२ १ मीं आपले डोळे वर करून पाहिलें तों पाहा,
एक मनुष्य हातांत मापनसूत्र घेऊन उभा आहे.
२ तेव्हां मीं विचारिलें, तूं कोठें जात आहेस? तो
मला म्हणाला, यरुशलेमाचें माप घेण्यास म्हणजे त्याची
लांबीरुंदी पाहण्यास मी जात आहें. ३ आणि पाहा,
मजबरोबर भाषण करणारा दिव्यदूत जाऊं लागला तेव्हां
दुसरा दिव्यदूत त्यास भेटावयास आला. ४ तो त्यास
म्हणाला, धावत जाऊन त्या तरुणास असें सांग, यरुश-
लेमांत मनुष्यें व गुरेंढोरें फार झाल्यामुळें विस्तीर्ण
मैदानांत होते तशी त्याची वस्ती होईल. ५ परमेश्वर
म्हणतो, त्याच्या सभोवार मी त्याला अग्नीचा कोट
होईन, व त्याच्या ठायीं मी तेजोरूप होईन.
६ अहो, तुम्ही उत्तरेकडील देशाहून पळून या, असें
परमेश्वर म्हणतो; मीं तर तुम्हांस आकाशांतील चारी
वाऱ्यांप्रमाणें चोहोंकडे विखरिलें आहे, असें परमेश्वर म्हणतो.
७ अगे सीयोने, बाबेलकन्येबरोबर राहणाऱ्ये, आपला
बचाव कर. ८ ज्या राष्ट्रांनीं तुम्हांस लुटिलें त्यांच्याकडे
[1]प्रताप मिळविण्यासाठीं, त्यानें मला पाठविलें आहे; जो
कोणी तुम्हांस स्पर्श करील तो त्याच्या डोळ्याच्या
बुबुळालाच स्पर्श करील; कारण सेनाधीश परमेश्वर
म्हणतो: ९ पाहा, मी आपला हात त्यांजवर उगारीन,
व त्यांची सेवा करणारे त्यांस लुटतील; तेव्हां तुम्हांला
समजेल कीं सेनाधीश परमेश्वरानें मला पाठविलें
आहे. १० हे सीयोनकन्ये, जयजयकार व उल्लास
कर; कारण पाहा, मी येईन, मी तुझ्यांत वस्ती करीन,
असें परमेश्वर म्हणतो. ११ त्या दिवसांत बहुत
राष्ट्रें परमेश्वराला येऊन मिळतील व माझी प्रजा
बनतील; मी तुझ्या ठायीं वस्ती करीन, मग तुला
समजेल कीं सेनाधीश परमेश्वरानें मला तुजकडे
पाठविलें आहे. १२ परमेश्वर पवित्र भूमींतला
आपला वांटा म्हणून यहूदाचा ताबा घेईल व पुनः
यरुशलेम निवडील. १३ सर्व मनुष्यहो, परमेश्वरापुढें
स्तब्ध व्हा, कारण तो आपल्या पवित्र निवासांतून
उठला आहे.

१ **मुळांत:** प्रतापाच्या मागें, त्यानें

३

१ तेव्हां मुख्य याजक यहोशवा हा परमे-
श्वराच्या दिव्यदूतासमोर उभा आहे व त्याचा
विरोध करण्यासाठीं सैतान त्याच्या उजवीकडे उभा
आहे, असें त्यानें मला दाखविलें. २ मग परमेश्वर
सैतानास म्हणाला, अरे सैताना, परमेश्वर तुला धमकी
देवो; यरुशलेम आपलेंसें करणारा परमेश्वर तुला
धमकी देवो; हा अग्नींतून काढिलेलें कोलीत नव्हे
काय? ३ यहोशवा मलीन वस्त्रें परिधान करून त्या
दिव्यदूतापुढें उभा होता. ४ त्याच्यासमोर जे उभे
होते त्यांस तो उत्तरादाखल म्हणाला, त्याच्यावरचीं
मलीन वस्त्रें काढा. तो त्याला म्हणाला, पाहा, मीं
तुझा अधर्म तुजपासून दूर केला आहे, मी तुला
उंची पोशाख घालीत आहें. ५ मी म्हणालों, त्याच्या
डोक्याला त्यांनीं स्वच्छ मंदील घालावा. तेव्हां त्यांनीं
त्याला स्वच्छ मंदील व पोशाख घातला; आणि परमे-
श्वराचा दिव्यदूत जवळ उभा होता.

६ परमेश्वराच्या दिव्यदूतानें यहोशवास प्रतिज्ञापूर्वक
सांगितलें कीं ७ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, तूं माझ्या
मार्गानें चालून तुला मीं सोपलेलें सर्व संभाळिलें तर तूं
माझ्या मंदिरांत न्याय करिशील व माझ्या अंगणाचें
रक्षण करिशील व येथें उभे असणाऱ्यांत तुझें जाणें-
येणें होईल असें मी करीन. ८ आता हे मुख्य याजका,
यहोशवा, तूं व तुजबरोबर बसणारे तुझे सोबती,
तुम्ही ऐका; तीं मनुष्यें चिन्हादाखल आहेत; पाहा, मी
माझा सेवक जो कोंब त्याला आणितों. ९ मीं यहोशवापुढें
ठेविलेला चिरा पाहा; एका चिऱ्याला सात डोळे आहेत;
पाहा, सेनाधीश परमेश्वर म्हणतो, मी त्यावर नकशी
खोदीन व त्या देशाचा अधर्म एका दिवसांत दूर
करीन. १० सेनाधीश परमेश्वर म्हणतो, त्या समयीं
तुम्ही प्रत्येक आपल्या शेजाऱ्यास द्राक्षीच्या वेलीखालीं
व अंजिराच्या झाडाखालीं येण्याचें आमंत्रण कराल.

४

१ मग मजबरोबर भाषण करणारा दिव्यदूत
मजकडे पुनः आला व जसें झोपेंतून एकाद्यास जागें
करितात तसें त्यानें मला जागें केलें. २ त्यानें मला
विचारिलें, तुझ्या दृष्टीस काय पडतें? मी म्हणालों, माझ्या
दृष्टीस असें पडतें कीं एक सबंध सोन्याचा दीपवृक्ष आहे,
त्याच्या शिरावर एक कटोरा असून त्याला सात दिवे
आहेत व त्याच्यावरील सात दिव्यांला सात नळ्या
आहेत; ३ आणि त्याच्याजवळ कटोऱ्याच्या उजव्या व
डाव्या बाजूंस दोन जैतुनाचीं झाडें आहेत. ४ तेव्हां
मजबरोबर भाषण करणाऱ्या दिव्यदूताला मीं विचारिलें,
माझ्या प्रभो, हीं काय आहेत? ५ मजबरोबर भाषण
करणारा दिव्यदूत मला म्हणाला, हीं काय आहेत हें
तुला ठाऊक नाहीं काय? मी म्हणालों, नाहीं, माझ्या
स्वामी. ६ तेव्हां त्यानें मला उत्तर केलें: जरूब्बा-
बेलास परमेश्वराचें हें वचन आहे: बलानें नव्हे,
पराक्रमानें नव्हे, तर माझ्या आत्म्यानें कार्यसिद्धि
होईल असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो. ७ हे महान्
पर्वता, तूं काय आहेस? जरूब्बाबेलापुढें तूं सपाट
मैदान होशील; व तो त्यावर अनुग्रह, त्यावर अनुग्रह,
असा गजर करीत कोनशिला पुढें आणील. ८ मग
परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें तें हें कीं, ९ जरूब्बा-
बेलाच्या हातांनीं या मंदिराचा पाया घातला,
त्याचेच हात तें बांधावयाचें पुरें करितील; व
सेनाधीश परमेश्वरानें मला तुम्हांकडे पाठविलें आहे हें
तूं समजशील. १० तर कार्याच्या अल्पारंभाचा दिवस
कोणी तुच्छ मानितो काय? ते सात डोळे जरूब्बा-
बेलाच्या हातांतील ओळंबा आनंदानें पाहतील; ते
परमेश्वराचे डोळे जगभर फिरत असतात.

११ मग मीं त्याला विचारिलें, दीपवृक्षाच्या उजव्या-
डाव्या बाजूंस हीं दोन जैतुनाचीं झाडें आहेत तीं काय?
१२ दुसऱ्यानें मीं त्याला विचारिलें, या दोन सुवर्णा-
च्या तोट्यांजवळच्या सुवर्णरूप तेलाचा प्रवाह
स्रवणाऱ्या ह्या दोन जैतुनाच्या फांद्या काय आहेत?
१३ त्यानें मला म्हटलें, त्या काय आहेत हें तुला
ठाऊक नाहीं काय? मीं म्हटलें, नाहीं, माझ्या स्वामी.
१४ तेव्हां त्यानें म्हटलें, अखिल पृथ्वीच्या प्रभूजवळ
उभे राहणारे हे दोन अभिषिक्त आहेत.

५ १ मीं पुनः डोळे वर करून पाहिलें तों पाहा,
एक उडता पट दृष्टीस पडला. २ त्यानें मला विचा-
रिलें, तुला काय दिसतें? मी म्हणालों, मला एक
उडता पट दिसतो, त्याची लांबी वीस हात व रुंदी दहा
हात आहे. ३ तो मला म्हणाला, या सर्व देशाला प्राप्त
होणारा शाप तो हा पट आहे; चोरी करणाऱ्या सर्वांस या
लेखानुसार एका बाजूनें घालवितील व खोटी शपथ वाह-
णाऱ्या सर्वांस या लेखानुसार दुसऱ्या बाजूनें घालवितील.
४ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, मीं हा पट चालविला
आहे; तो चोराच्या घरांत व माझ्या नामाची खोटी
शपथ घेणाऱ्याच्या घरांत शिरेल; तो त्याच्या घरांत
बिऱ्हाड देऊन राहील आणि त्याच्या तुळ्यांचें व
चिऱ्यांचें भस्म करील.
५ मग मजबरोबर भाषण करणारा दिव्यदूत पुढें येऊन
मला म्हणाला, आतां आपले डोळे वर करून काय जात
आहे तें पाहा. ६ मीं विचारिलें, हें काय आहे? तो
म्हणाला, ही चालली आहे ती एक एफा आहे. आणखी
त्यानें म्हटलें कीं ही सर्व देशभर त्यांचें प्रतिरूप आहे;
७ मीं आणखी पाहिलें तों शिशाचें वाटोळें झाकण
काढिलें असून एफामध्यें एक स्त्री बसलेली आहे असें
माझ्या दृष्टीस पडलें. ८ मग तो म्हणाला, ही स्त्री दुष्टता
आहे; तेव्हां त्यानें तिला एफामध्यें कोंबून तोंडावर
शिशाचें वाटोळें झाकण बसविलें. ९ मग मीं डोळे वर
करून पाहिलें तों पाहा, दोन स्त्रिया निघाल्या, त्यांच्या
पंखांत वारा भरलेला होता; त्यांचे पंख करकोचाच्या
पंखांसारखे होते; त्यांनीं ती एफा उचलून आकाश व पृथ्वी
यांच्या मधल्या मार्गानें नेली. १० मग मजबरोबर भाषण
करणाऱ्या दिव्यदूताला मीं विचारिलें: ते ती एफा घेऊन
कोठें जात आहेत? ११ तो मला म्हणाला शिनार देशांत
तिजसाठीं घर बांधावें म्हणून ती ते नेत आहेत; तें
तयार झालें म्हणजे तो तेथें तिच्या स्थानीं स्थापितील.

६ १ पुनः मीं आपले डोळे वर केले तों पाहा,
दोन पर्वतांमधून चार रथ येत आहेत असें दिसलें;
ते पर्वत पितळेचे होते. २ पहिल्या रथाला तांबडे
घोडे होते; दुसऱ्या रथाला काळे घोडे होते; ३ तिसऱ्या
रथाला पांढरे घोडे होते; व चवथ्या रथाला कबरे
लालसर घोडे होते. ४ तेव्हां मजबरोबर भाषण करणा-
ऱ्या दिव्यदूताला मीं विचारिलें, माझ्या स्वामी, हे काय
आहेत? ५ दिव्यदूतानें मला उत्तर केलें, हे आकाशांतले
चार वारे आहेत; ते अखिल पृथ्वीच्या प्रभूच्या
हुजुरास असून आतां बाहेर निघत आहेत. ६ काळे
घोडे असलेला रथ उत्तर देशीं जात आहे; पांढरे घोडे
त्यांच्या मागून मागून जात आहेत; कबरे घोडे दक्षिण
देशीं जात आहेत. ७ तांबडे घोडेहि बाहेर गेले; त्यांचा
पृथ्वीभर फिरण्याचा रोख होता; त्यांस तो म्हणाला,
चला, पृथ्वीवर फिरा. तेव्हां ते पृथ्वीवर फिरले.
८ मग त्यानें मला हाक मारून म्हटलें, पाहा, उत्तर देशीं
जाणाऱ्यांनीं उत्तर देशांत माझा आत्मा शांत केला आहे.
९ मग परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं
१० बंदिवासांतून आलेल्या लोकांपैकीं हेल्दय, तोबीया
व यदया यांच्या माणसांस बरोबर घे; ते बाबेलाहून
येऊन सफन्याचा पुत्र योशीया याच्या घरीं उतरले
आहेत तेथें आजच्या आज जा; ११ सोनेंरुपें घेऊन
मुकुट घडीव व ती यहोसादाकाचा पुत्र यहोशवा मुख्य
याजक याच्या मस्तकीं घाल. १२ त्याला सांग कीं
सेनाधीश परमेश्वर म्हणतो, पाहा, एक पुरुष, ज्याचें नांव
कोंब असें आहे तो आपल्या स्थानीं उगवेल व तो पर-
मेश्वराचें मंदिर बांधील; १३ तोच परमेश्वराचें मंदिर
बांधील; तो वैभवशाली होईल व आपल्या सिंहासनावर
बसून सत्ता चालवील; तो आपल्या सिंहासनावर
याजकहि होईल; या दोहोंत शांततेची सल्लामसलत
होईल. १४ तो मुकुट हेलेम, तोबीया, यदया व सफ-
न्याचा पुत्र हेन यांचें परमेश्वराच्या मंदिरांत स्मारक
होईल. १५ मग जे दूर आहेत ते येतील व परमेश्वराचें
मंदिर बांधण्यास हातभार लावितील आणि सेनाधीश
परमेश्वरानें मला तुम्हांकडे पाठविलें आहे हें तुम्हांला
कळून येईल. परमेश्वर तुमचा देव यांचें तुम्ही लक्ष
देऊन ऐकाल तर हें घडून येईल.

१ एक माप. २ पाठभेद : त्यांचा अधर्म

१ अथवा : आत्मे

१ दारयावेश राजाच्या कारकीर्दीच्या चवथ्या
७ वर्षी असें झालें कीं नवव्या म्हणजे किसलेव
महिन्याच्या चतुर्थीला परमेश्वराचें वचन जखऱ्यास
प्राप्त झालें. २ तेव्हां बेथेलकरांनीं शरेसर, रगेम्मेलेक
व त्यांचे लोक यांस परमेश्वराचा अनुग्रह मागण्यास,
३ आणि सेनाधीश परमेश्वराच्या मंदिरांत राहणारे
याजक व संदेष्टे यांस असें विचारण्यास पाठविलें कीं
आम्ही वर्षानुवर्षे करीत आलों तसें पांचव्या महिन्यांत
एकांतीं बसून रुदन करावें काय ? ४ मग सेनाधीश
परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें कीं ५ तूं या देशां-
तील सर्व लोकांस व याजकांस विचार: तुम्हीं सत्तर
वर्षे पांचव्या व सातव्या महिन्यांत उपोषण व रुदन
केलें तेव्हां खरोखर माझ्यासाठीं उपोषण केलें काय ?
६ तुम्ही खातांपितां तेव्हां आपल्याचसाठीं खात-
पीत नाहीं काय ? ७ यरुशलेम वसलेलें व आबादीआबाद
होतें आणि त्याच्यासभोवतालचे गांव, तसेंच दक्षिण-
देश व तळवट यांत वस्ती होती तेव्हां परमेश्वरानें
पूर्वीच्या आपल्या संदेष्ट्यांच्या द्वारें जीं वचनें पुकारून
सांगितलीं तीं हीं नव्हत काय ?
८ मग परमेश्वराचें वचन जखऱ्यास प्राप्त झालें कीं
९ सेनाधीश परमेश्वर म्हणाला आहे: तुम्ही खरा न्याय
करा, व एकमेकांस प्रेम व करुणा दाखवा; १० आणि
विधवा, अनाथ, परके व निराश्रित यांवर जुलूम करूं
नका व आपल्या भावाला इजा करण्याचें मनांत आणूं
नका; ११ पण ते ऐकतना, त्यांनीं मान ताठ
केली व ऐकूं नये म्हणून कान बंद केले. १२ पूर्वीच्या
संदेष्ट्यांच्या द्वारें सेनाधीश परमेश्वरानें आपल्या
आत्म्याच्या द्वारा पाठविलेलें धर्मशास्त्र व वचनें ऐकूं नयेत
म्हणून त्यांनीं आपलें मन पाषाणासारखें कठीण केलें;
वास्तव सेनाधीश परमेश्वराचा त्यांजवर मोठा कोप
झाला. १३ तेव्हां असें झालें कीं तो हाक मारीत
असतां त्यांनीं ऐकलें नाहीं, म्हणून ते हाक मारितील
तरी मी ऐकावयाचा नाहीं, असें सेनाधीश परमेश्वर
म्हणतो. १४ जीं राष्ट्रें त्यांच्या ओळखीचीं नाहींत
त्यांमध्यें मी त्यांस वावटळीनें उडवीत. त्यांच्यामागें
त्यांचा देश उजाड झाला आहे; त्यांतून कोणी जात-
येत नाहीं; कारण त्यांनीं उत्तम भूमि वैराण केली आहे.

१ मग सेनाधीश परमेश्वराचें वचन मला प्राप्त
८ झालें कीं २ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, सीयोना-
संबंधानें मी अतिशयित ईर्ष्यायुक्त झालों आहें;
तिच्याकरितां संतप्त आवेशानें मी ईर्ष्यायुक्त झालों आहें.
३ परमेश्वर असें म्हणतो, मी सीयोनास परत आलों आहें,
मी यरुशलेमांत वस्ती करणार; यरुशलेमास सत्य नगर
म्हणतील व सेनाधीश परमेश्वराच्या पर्वतास पवित्र
गिरी म्हणतील. ४ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, म्हातारे
व म्हाताऱ्या, यरुशलेमाच्या गल्ल्यांत आपल्या वृद्धाप-
काळामुळें हातीं काठी घेऊन बसतील. ५ नगराच्या
गल्ल्यांनीं खेळ खेळणाऱ्या मुलामुलींची गर्दी होईल.
६ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, त्या दिवसांत या अव-
शिष्ट राष्ट्रास ही गोष्ट अचंब्याची वाटले म्हणून
माझ्याहि दृष्टीनें अचंब्याची होईल काय, असें
सेनाधीश परमेश्वर म्हणतो. ७ सेनाधीश परमेश्वर
म्हणतो, मी आपल्या लोकांचा उगवतीकडून व मावळ-
तीकडून उद्धार करीन; ८ मी त्यास घेऊन येईन व
ते यरुशलेमांत वस्ती करितील, आणि सत्यानें व
धर्मानें ते माझे लोक होतील व मी त्यांचा देव होईन.
९ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, सेनाधीश परमेश्वराचें
मंदिर बांधावें म्हणून त्याचा पाया घातला
त्या वेळच्या संदेष्ट्यांचीं हीं वचनें या समयीं तुम्ही
ऐकत आहां, ते तुम्ही आपले हात दृढ करा.
१० त्या दिवसापूर्वी माणसास मजुरी मिळत नसे,
पशूबद्दल भाडें मिळत नसे व येणाऱ्याजाणाऱ्यास
शत्रूमुळें स्वास्थ्य मिळत नसे; कारण माणसांनीं एक-
मेकांवर उलटावें असें मी केलें. ११ मी पूर्वी
होतों तसा या अवशिष्ट लोकांबरोबर असणार नाहीं, असें
सेनाधीश परमेश्वर म्हणतो. १२ शांततेचें बीजारोपण
होत आहे; द्राक्षी आपलें फळ देईल, भूमि आपला
उपज देईल आणि आकाश आपलें दहिंवर देईल; या
अवशिष्ट लोकांस मी या अवघ्यांचें वतन देईन. १३ हे
यहूदाच्या घराण्या व हे इस्राएलाच्या घराण्या, असें होईल

कीं जे तुम्ही राष्ट्रांत शापरूप होतां त्या तुमचा उद्धार मी
करीन व तुम्ही आशीर्वादरूप व्हाल; भिऊं नका,
तुमचे हात दृढ होवोत.
१४ कारण सेनाधीश परमेश्वर असें म्हणतो, तुमच्या
पूर्वजांनीं मला कोप आणिला तेव्हां तुमचें अनिष्ट कर-
ण्याचें मीं योजिलें याविषयीं मला अनुताप झाला नाहीं,
असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो; १५ त्याप्रमाणें या दिव-
सांत यरुशलेमाचें व यहूदाच्या घराण्याचें हित करण्याचें
मीं योजिलें आहे; भिऊं नका. १६ तुम्हीं करावयाचें तें
हेंच कीं तुम्ही सर्व आपल्या शेजाऱ्याबरोबर खरें बोला;
आपल्या वेशींत खरेपणानें वर्ता व शांतिदायक न्याय करा;
१७ तुम्ही कोणी मनांत आपल्या शेजाऱ्याचें अनिष्ट चिंतूं
नका; खोट्या शपथेची आवड धरूं नका; कारण या
सर्वांचा मला तिटकारा आहे, असें परमेश्वर म्हणतो.
१८ सेनाधीश परमेश्वराचें वचन मला प्राप्त झालें
कीं १९ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, चवथ्या, पांचव्या,
सातव्या व दहाव्या महिन्यांतले उपास यहूदाच्या घरा-
ण्यास हर्ष व आनंद देणारे होतील; ते आनंदाच्या उत्स-
वांचे दिवस होतील; म्हणून सत्य व शांति यांची आवड
धरा. २० सेनाधीश परमेश्वर असें म्हणतो : राष्ट्रें व अनेक
नगरांचे रहिवासी येतील अशी वेळ येईल; २१ एका
नगराचे रहिवासी दुसऱ्या नगरास जाऊन म्हणतील,
आपण त्वरेनें जाऊन परमेश्वराजवळ अनुग्रह मागूं व
सेनाधीश परमेश्वराच्या चरणीं लागूं; मीहि जातों.
२२ पुष्कळ लोक व असमर्थ राष्ट्रें यरुशलेमांत सेनाधीश
परमेश्वराच्या चरणीं लागण्यास व परमेश्वराजवळ
अनुग्रह मागण्यास येतील. २३ सेनाधीश परमेश्वर असें
म्हणतो कीं त्या दिवसांत सर्व भाषा बोलणाऱ्या राष्ट्रांपैकीं
दहा जण यहूदी माणसाचा पदर धरून म्हणतील,
आम्ही तुम्हांबरोबर येतों, कारण देव तुम्हांबरोबर
आहे असें आम्हीं ऐकलें आहे.

१ हद्राख देशाविषयीं परमेश्वराची वाणी :
९ ती दिमिष्कास पोहंचवून तेथें स्थिर होईल; कारण
परमेश्वराची नजर मनुष्यजातीकडे व इस्राएलाच्या
सर्व वंशांकडे आहे; २ त्याच्या सीमेवरल्या हमाथाकडे
आणि सोर व सीदोन यांकडेहि ती आहे; कारण तीं
फार शहाणीं आहेत. ३ सोरानें आपणासाठीं मजबूत
दुर्ग बांधिला, धुळीप्रमाणें रुप्याचा व रस्त्यावरील
चिखलाप्रमाणें सोन्याचा संचय केला. ४ पाहा, प्रभु
त्याची सत्ता काढून घेईल, त्याची तटबंदी समुद्रांत
टाकील; तें अग्नीनें भस्म होईल. ५ अष्कलोन हें पाहून
घाबरेल; गज्जाहि पाहून वेणा देईल, व एक्रोनहि असेंच
करील, कारण त्याची आशा नष्ट होऊन तें लज्जित
होईल; गज्जांत राजा नाहीं असें होईल, अष्कलोनांत
वस्ती व्हावयाची नाहीं. ६ अश्दोदांत जारज वस्ती करील,
व मी पलिष्ट्यांचा अभिमान नाहींसा करीन. ७ मी त्याच्या
मुखांतलें रक्त[1] व त्याच्या दातांतले अमंगळ पदार्थ काढून
टाकीन; तोहि आमच्या देवासाठीं बचावून राहील; तो
यहूदांतल्या सरदारासारखा होईल व एक्रोन यबूस्या-
सारखा होईल. ८ कोणीं येऊंजाऊं नये म्हणून मी सैन्य
रोखण्यासाठीं माझ्या मंदिराभोंवतीं तळ देईन; जुलूम
करणारा पुनः त्यांजवर चाल करून जाणार नाहीं; कारण
आतां मीं प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिलें आहे.
९ सीयोनकन्ये, जोरानें आनंदाचा गजर कर; यरु-
शलेमकन्ये, गजर कर; पाहा, तुझा राजा तुजकडे येत
आहे; तो न्यायी व यशस्वी आहे; तो लीन आहे; गाढ-
वावर, गाढवीच्या पोरावर म्हणजे शिंगरावर बसून येत
आहे. १० एफ्राइमांतले रथ, यरुशलेमांतले घोडे मी नष्ट
करीन; युद्धधनुष्य तोडून टाकण्यांत येईल, तो राष्ट्रांबरोबर
शांतीच्या गोष्टी बोलेल; त्याचें अधिपत्य प्रत्येक समुद्रावर
व फरातनदापासून तों पृथ्वीच्या दिगंतापर्यंत चालेल.
११ तुजविषयीं म्हणशील तर तुझ्याबरोबर केलेल्या
कराराच्या रक्तसिंचनामुळें मी तुझ्या बंदिवानांस निर्जल
गर्तेतून मुक्त करीन. १२ आशा धरून राहिलेले बंदि-
वानहो, दुर्गाकडे परत या; आज मी हें जाहीर करितों कीं मी
तुला दुप्पट प्रतिफळ देईन. १३ मीं यहूदारूप धनुष्य वाक-
वून एफ्राईमरूप बाण लाविला आहे; हे सीयोने, मी तुझ्या
पुत्रांस चेतवीन; हे ग्रीसा[2], त्यांला तुझ्या पुत्राविरुद्ध चेतवीन;

१ लेवीय १९:२६ पाहा. २ मुळांत : यावाना.

वीराच्या खड्गाप्रमाणें तुला करीन. १४ त्यांच्यावरती
परमेश्वर दृष्टीस पडेल, त्याचे बाण विद्युल्लतेसारखे
सुटतील; प्रभु परमेश्वर रणशिंग फुंकील व दक्षिणे-
कडच्या वावटळींत कूच करील. १५ सेनाधीश
परमेश्वर त्यांचा संभाळ करील; ते शत्रूंस गिळितील
व गोफणगुंडे पायांखालीं तुडवितील; ते पितील व
द्राक्षारस प्याल्याप्रमाणें गोंगाट करितील; ते यज्ञाच्या
कटोऱ्यांसारखे, वेदीच्या कोपऱ्यांसारखे भरून राहतील.
१६ परमेश्वर त्यांचा देव आपल्या लोकांचा कळपा-
सारखा त्या दिवशीं बचाव करील; कारण ते त्याच्या
देशांत मुकुटावरील रत्नांप्रमाणें उंच स्थानीं शोभतील.
१७ त्यांची आबादानी केवढी! त्यांचें सौंदर्य केवढें!
धान्य तरुणांस आणि नवा द्राक्षारस तरुणींस धष्टपुष्ट
करील.

१ वीज उत्पन्न करणाऱ्या परमेश्वराजवळ
१० वळवाच्या पावसाच्या वेळीं पाऊस मागा म्हणजे
तो त्यांजवर वृष्टि करील; तो प्रत्येकाच्या शेतांत
गवत उपजवील. २ कारण तेराफीम व्यर्थ गोष्टी
बोलल्या आहेत, दैवज्ञांनीं खोटा दृष्टांत पाहिला आहे
व फसविणारीं स्वप्नें सांगितलीं आहेत; ते कोरडा
धीर देतात; यामुळें ते मेंढरांप्रमाणें भटकले आहेत.
त्यांस कोणी मेंढपाळ नसल्यामुळें त्यांजवर जुलूम
होत आहे. ३ मेंढपाळांवर माझा क्रोध भडकला
आहे, बोकडांचें मी शासन करीन; कारण सेनाधीश
परमेश्वरानें आपला कळप जें यहूदाचें घराणें त्याची भेट
घेतली आहे, तो त्यास आपल्या लढाईच्या सजविलेल्या
घोड्यासारखें करील. ४ त्याच्यापासूनच कोनशिला,
त्याच्यापासूनच खुंटी, त्याच्यापासूनच युद्धधनुष्य,
त्याच्यापासूनच प्रत्येक अधिकारी निघतो. ५ युद्धांत
चिखल तुडविणाऱ्या योद्ध्यांप्रमाणें ते होतील; ते युद्ध
करितील, कारण परमेश्वर त्यांजबरोबर आहे; घोडेस्वार
फजीत होतील. ६ मी यहूदाच्या घराण्यास शक्ति पुर-
वीन, योसेफाच्या घराण्याची मुक्तता करीन, देशांत
त्यांची वस्ती करीन; कारण त्यांजवर मीं करुणा केली
आहे; मीं त्यांचा त्याग केलाच नाहीं असे ते होतील;
कारण मी परमेश्वर त्यांचा देव आहें, मी त्यांचें
ऐकेन. ७ एफ्राईम वीरासारखा होईल, द्राक्षारसानें होतें
तसें त्यांचें हृदय हर्षित होईल; त्यांचीं मुलें हें पाहून
उल्लास पावतील; त्यांचें हृदय परमेश्वराच्या ठायीं आनंदेल.
८ मी शीळ घालून त्यांस जमा करीन; कारण मीं
त्यांस सोडवून घेतलें आहे; त्यांची पूर्वी वृद्धि झाली
तशी ते वृद्धि पावतील. ९ मी राष्ट्रांमध्यें त्यांची पेरणी
करीन; दूर देशांत ते माझें स्मरण करितील; ते आपल्या
मुलांसहित जीवंत राहून माघारें येतील. १० मी त्यांस
मिसर देशांतून माघारें आणीन, अश्शूर देशांतून त्यांस
एकत्र करीन; गिलाद व लबानोन यांच्या भूमीवर त्यांस
आणीन; त्यांस जागा पुरावयाची नाहीं. ११ तो संकट-
समुद्रांतून पार जाऊन समुद्रलहरींस दबकावील; नील
नदीचें गहिरें पाणी सर्व सुकून जाईल, अश्शूराचा गर्व
उतरेल, मिसरचें राजवेत्र निघून जाईल. १२ मी त्यांस
परमेश्वराच्या ठायीं बलवान् करीन; ते त्याच्या नामानें
येतीलजातील असें परमेश्वर म्हणतो.

१ हे लबानोना, आपल्या वेशी उघड
११ म्हणजे अग्नि तुझे गंधसरू भस्म करील. २ हे
देवदारू, हायहाय कर; कारण गंधसरू
पडला आहे, वृक्षराज नष्ट झाले आहेत; बाशानाच्या
ओक वृक्षांनो, हाय हाय करा, कारण निबिड
वन जमीनदोस्त झालें आहे. ३ ऐका, मेंढपाळांचा
हाहाकाराचा शब्द होत आहे! कारण त्यांचें वैभव
लयास गेलें आहे; ऐका, तरुण सिंहाची घोर गर्जना
होत आहे! कारण यार्देनेचें घोर अरण्य लयास गेलें
आहे.

४ परमेश्वर माझा देव म्हणतो, वधासाठीं
नेमिलेल्या मेंढरांस चार; ५ त्यांचे मालक त्यांचा वध
करितात व आपणांला निर्दोष समजतात; त्यांची विक्री
करणारे म्हणतात कीं परमेश्वराचा धन्यवाद होवो;
मी श्रीमंत झालों आहें; त्यांचे स्वतांचे मेंढपाळ
त्यांवर कांहीं दया करीत नाहींत. ६ मी या देशाच्या
रहिवाश्यांवर यापुढें दया करणार नाहीं, असें परमेश्वर

१ गृहदेवता अथवा कुलदेवता

म्हणतो; पण मी त्यांस एकमेकांच्या व राजाच्या
हातीं देईन; ते देश नष्ट करितील व मी त्यांस
त्यांच्या हातांतून सोडविणार नाहीं. ७ मी वधासाठीं
नेमिलेल्या मेंढरांस चारिलें, मेंढरांतल्या अतिशयित
दुबळ्यांस चारिलें. मी दोन काठ्या घेतल्या, एकीचें
नांव रमणीयता असें ठेविलें आणि दुसरीचें नांव बंधन
असें ठेविलें; व मी त्या कळपास चारिलें. ८ मी एका
महिन्यांत तीन मेंढपाळ कापून टाकिले, कारण माझ्या
जिवाला त्यांचा कंटाळा आला व त्यांच्या जिवास माझा
कंटाळा आला. ९ मग मी म्हणालों, मी यापुढें तुम्हांस
चारणार नाहीं; कोणी मेलें तर मरूं द्या, कोणी नष्ट
झालें तर होऊं द्या; बाकी राहिलेल्यांस एकमेकांचें
मांस खाऊं द्या. १० सर्व राष्ट्रांबरोबर मीं केलेला करार
मोडावा म्हणून रमणीयता नांवाची काठी मीं घेतली आणि
तिचे मोडून तुकडे केले. ११ त्या दिवशीं ती मोडिली;
तेव्हां ज्यांनीं माझें ऐकलें होतें असे त्या कळपांत
असलेले अतिशयित दुबळे समजले कीं हें परमेश्वराचें
वचन आहे. १२ मग मी त्यांस म्हणालों, तुम्हांस बरें
दिसलें तर मला माझें वेतन द्या, नाहींतर जाऊं द्या.
तेव्हां त्यांनीं मला माझें वेतन तीस रुपये तोलून दिलें.
१३ परमेश्वर मला म्हणाला, त्यांनीं जें माझें भारी मोल
ठरविलें तें कुंभारापुढें फेकून दे. तेव्हां ते तीस रुपये
घेऊन मीं परमेश्वराच्या मंदिरांत कुंभारापुढें फेकून
दिले. १४ मग यहूदा व इस्राएल यांचें बंधुत्व मोडावें
म्हणून मीं बंधन नांवाची माझी दुसरी काठी मोडिली.

१५ परमेश्वर मला म्हणाला, जाऊन पुनः एकाद्या
मूर्ख मेंढपाळाचीं आउतें घे. १६ कारण पाहा, मी
देशांत एक मेंढपाळ आणितों; तो मरावयाच्या लागास
आलेल्यांकडे ढुंकून पाहणार नाहीं, भटकलेल्या मेंढरांस
तो धुंडणार नाहीं, मोडलेल्यांस बरें करणार नाहीं,
धडधाकटांचें तो पालन करणार नाहीं; तर पुष्ट मेंढरांचें
मांस तो खाईल व त्यांच्या खुरांचे तुकडे तुकडे करील.
१७ कळपास सोडून देणाऱ्या कवडीमोल मेंढपाळास
धिक्कार असो! त्याच्या बाहूवर व त्याच्या उजव्या
डोळ्यावर तरवार चालेल; त्याचा बाहु सुकेल, त्याचा
उजवा डोळा अगदीं अंध होईल.

१ पाठभेद: खजिन्यांत

१ इस्राएलाविषयीं परमेश्वराची वाणी:

१२ आकाश पसरणारा, पृथ्वीचा पाया घालणारा
व मनुष्याच्या अंतर्यामीं आत्मा निर्माण करणारा
परमेश्वर म्हणतो: २ पाहा, मी यरुशलेमास त्याच्या
सभोवतालच्या सर्व राष्ट्रांस झोकांडविणाऱ्या कटोऱ्या-
सारखें करितों; यरुशलेमाला घेरितील तेव्हां यहूदाचीहि
तीच गत होईल. ३ त्या दिवशीं असें होईल कीं
सर्व राष्ट्रांला भारी पाषाणासारखें असें मी यरुशलेमास करीन;
जे कोणी तो उचलतील ते स्वतांला जखम करून घेतील;
पृथ्वीवरील सर्व राष्ट्रें त्याविरुद्ध जमतील. ४ परमेश्वर
म्हणतो, त्या दिवशीं मी प्रत्येक घोड्यास बुजवीन व
त्यावरील स्वारास वेडें करीन; मी आपले डोळे उघडून
यहूदाच्या घराण्याकडे पाहीन व राष्ट्रांच्या प्रत्येक
घोड्यास अंधत्व आणीन. ५ तेव्हां यहूदाचे सरदार
आपल्या मनांत म्हणतील कीं यरुशलेमाचे रहिवासी
आपला देव सेनाधीश परमेश्वर याच्या योगें मला
पाठबळासारखे आहेत. ६ त्या दिवशीं मी यहूदाच्या
सरदारांस लाकडाखालच्या आगटीसारखे, पेंढ्यांखालच्या
जळत्या मशालीसारखे करीन; ते उजवीकडील व डावी-
कडील सभोवतालच्या सर्व राष्ट्रांस खाऊन टाकितील;
यरुशलेम आपल्या पूर्वीच्या जागीं म्हणजे यरुशलेमाच्या
जागीं पुनः वसेल. ७ परमेश्वर प्रथम यहूदाचे डेरे
बचावील, म्हणजे दाविदाच्या घराण्याचें वैभव आणि
यरुशलेमनिवासी जनांचें वैभव यहूदावर वरचढ व्हाव-
याचें नाहीं. ८ त्या दिवशीं परमेश्वर यरुशलेमनिवास्यांचें
रक्षण करील; त्या दिवशीं त्यांतला निर्बल दाविदासमान
होईल; व दाविदाचें घराणें देवासमान म्हणजे अर्थात्
त्यांचा अग्रगामी परमेश्वराच्या दिव्यदूतासमान होईल.
९ त्या दिवशीं असें होईल कीं यरुशलेमावर चढाई
करून येणाऱ्या सर्व राष्ट्रांचा नाश करण्याची मी खटपट

१ अथवा: यरुशलेमाच्या वेढ्याच्या समयीं यहूदा-
लाहि भाग घ्यावा लागेल.

करीन; १० आणि मी दाविदाच्या घराण्यावर व यरुशलेम-
निवाश्यांवर कृपा व विनवणी यांच्या आत्म्याचा वर्षाव
करीन आणि ज्या मला त्यांनीं विंधिलें त्या मजकडे ते
पाहतील; एकुलत्या एका पुत्रासाठीं शोक करावा तसे ते
त्यासाठीं शोक करितील; ज्येष्ठ पुत्राबद्दल जसा कोणी
अत्यंत खेद करितो तसा ते त्याबद्दल खेद करितील. ११
त्या दिवशीं मगिद्दोनाच्या खोऱ्यांतील हदाद्रिम्मोनाच्या
आकांताप्रमाणें यरुशलेमांत मोठा आकांत होईल. १२ देश
आक्रंदन करील, प्रत्येक कुटुंब वेगवेगळें आक्रंदन करील;
इकडे दाविदाचें घराणें व इकडे त्याचा स्त्रीवर्ग; इकडे
नाथानाचें घराणें व इकडे त्याचा स्त्रीवर्ग; १३ इकडे
लेवीचें घराणें व इकडे त्याचा स्त्रीवर्ग; इकडे शिमीचें
घराणें व इकडे त्याचा स्त्रीवर्ग; १४ उरलेल्या सर्व
घराण्यांतले लोक वेगळे व त्यांचा स्त्रीवर्ग वेगळा असे
ते आक्रंदन करितील.

१३ १ पाप व अशुद्धता हीं दूर करण्यास त्या
दिवशीं दाविदाच्या घराण्यासाठीं व यरुशलेम-
निवाश्यांसाठीं एक झरा फुटेल. २ सेनाधीश
परमेश्वर म्हणतो, त्या दिवशीं असें होईल कीं मी देशां-
तून मूर्तींच्या नांवांचा उच्छेद करीन, त्यांची यापुढें
आठवण होणार नाहीं; आणि संदेष्टे व अशुद्ध आत्मा
ह्यांस देशांतून घालवून देईन; ३ आणि असें होईल कीं
कोणी संदेश वदूं लागल्यास त्याचे जन्मदाते आईबाप
त्याला म्हणतील, तूं जीवंत राहावयाचा नाहींस,
कारण तूं परमेश्वराच्या नामानें लबाड्या सांगितल्या
आहेत: तो संदेश वदूं लागला तर त्याचे जन्मदाते
आईबाप त्याला भोसकून मारितील. ४ त्या दिवशीं
असें होईल कीं संदेष्टा संदेश वदतांना आपल्या प्रत्येक
दृष्टांतासंबंधानें लज्जित होईल व लोकांस फसविण्यासाठीं
केसांचा झगा घालणार नाहीं; ५ पण तो म्हणेल, मी
कांहीं संदेष्टा नाहीं, शेती करणारा मनुष्य आहें;
कारण मला लहानपणींच कोणी दास केलें. ६ जर कोणीं
त्यास विचारलें कीं तुझ्या बाहूंच्यामध्यें ह्या जखमा
कसल्या? तर तो म्हणेल, माझ्या इष्टमित्रांच्या घरीं
लागलेल्या घावांचे हे वण आहेत.

१ पाठभेद: ज्याला त्यांनीं विंधिलें त्याजकडे ते

७ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, अगे तरवारी, माझ्या
मेंढपाळावर व जो पुरुष माझा सोबती त्याजवर उठ;
मेंढपाळावर प्रहार कर म्हणजे मेंढरें विखरतील; माझ्या
लहानग्यांवर मी आपल्या हाताची छाया करीन,
८ परमेश्वर म्हणतो, देशभर असें होईल कीं त्याचे
दोन भाग नष्ट करितील, पण त्याचा तिसरा भाग मागें
राहील. ९ तो तिसरा भाग मी अग्नींत टाकीन, रुपें
गाळितात तसें त्यांस गाळीन, सोनें शुद्ध करितात
त्याप्रमाणें त्यांस शुद्ध करीन; ते माझें नाम घेतील
तेव्हां मी त्यांचें ऐकेन; मी म्हणेन, हे माझे लोक व
ते म्हणतील, परमेश्वर माझा देव.

१४ १ पाहा, परमेश्वराचा दिवस येत आहे; त्या
दिवशीं तुझी लूट तुझ्या वस्तींत वांटून घेतील.
२ यरुशलेमाबरोबर लढण्यास चढाई करून यावें
म्हणून मी सर्व राष्ट्रांस जमा करीन: ते नगर हस्तगत
करितील, घरें लुटितील, स्त्रियांना भ्रष्ट करितील; अर्धें
नगर बंदिवासांत जाईल, तरी अवशिष्ट लोक नगरांतून
नाहींतसे होणार नाहींत. ३ तेव्हां परमेश्वर पुढें
सरसावेल; पूर्वी युद्धसमयीं ज्या प्रकारें त्यानें युद्ध केलें
त्या प्रकारें त्या राष्ट्रांबरोबर तो युद्ध करील. ४ आणि त्या
दिवशीं यरुशलेमासमोर पूर्वेस असलेल्या जैतुनझाडांच्या
डोंगराला त्याचे पाय लागतील तेव्हां जैतूनझाडांचा डोंगर
पूर्वपश्चिम दुभागून मध्यें एक मोठें खोरें उत्पन्न होईल;
अर्धा डोंगर उत्तरेकडे व अर्धा डोंगर दक्षिणेकडे सरेल;
५ तुम्ही माझ्या डोंगरांच्या खोऱ्याकडे धावाल, कारण
डोंगरांचें खोरें आसलापर्यंत जाऊन भिडेल; व यहूदाचा
राजा उज्जीया याच्या काळांत झालेल्या भूमिकंपापासून
जसें तुम्ही पळालां तसें पळाल; परमेश्वर माझा देव
येईल, तुजसमागमें तुझे सर्व भक्त येतील; ६ आणि
त्या दिवशीं असें होईल कीं प्रकाश असणार नाहीं;
प्रकाशमान ज्योति विरघळून जातील. ७ तो एक
विशेष दिवस होईल, तो परमेश्वरालाच ठाऊक; तो ना
धड दिवस, ना धड रात्र असा होईल; तरी असें होईल
कीं संध्याकाळीं प्रकाश राहील. ८ त्या दिवशीं आणखी
असें होईल कीं यरुशलेमांतून जीवंत पाण्याचे झरे
फुटून वाहतील; अर्धे पूर्व समुद्राकडे व अर्धे पश्चिम

समुद्राकडे वाहतील; उन्हाळ्यांत व हिंवाळ्यांत
तसेंच होईल. ९ तेव्हां परमेश्वर सर्व पृथ्वीवर राजा
होईल; त्या दिवशीं परमेश्वर तेवढा व त्याचें नाम
तेवढें राहील. १० तेव्हां सर्व देश यरुशलेमाच्या
दक्षिणेस असलेलीं गेबा व रिम्मोन यांमधील अराबा-
प्रमाणें होईल; यरुशलेमाचा उद्धार होऊन बन्यामिनाच्या
वेशीपासून पहिल्या वेशीपर्यंत, कोपराच्या वेशीपर्यंत,
तसेंच हानामेलाच्या बुरुजापासून राजाच्या द्राक्षकुंडा-
पर्यंत तें आपल्या स्थळीं वसेल. ११ लोक त्यांत वस्ती
करितील; यापुढें त्यावर शाप राहावयाचा नाहीं; तर तें
निर्भय असें वसेल.

१२ तेव्हां ज्या राष्ट्रांनीं यरुशलेमाबरोबर लढाई चाल-
विली त्या सर्वांचा संहार परमेश्वर ज्या मरीनें करील
ती ही: ते पायांवर उभे असतां त्यांचें मांस कुजेल,
त्यांचे डोळे जागच्या जागीं सडतील, त्यांच्या मुखांत
त्यांची जिव्हा सडेल. १३ त्या दिवशीं असें होईल कीं
परमेश्वराकडून त्यांची फार त्रेधा उडेल, ते प्रत्येक आपा-
पल्या शेजाऱ्याचा हात धरितील; आणि त्या प्रत्येकाचा
हात आपल्या शेजाऱ्याच्या हाताशीं प्रतिकार करील. १४
यहूदाहि यरुशलेमांत युद्ध करील; आसपासच्या सर्व राष्ट्रां-
तील धन जमा होईल; सोनें, रुपें व पोषाख यांचा पूर
लोटेल. १५ तसेंच या मरीप्रमाणें घोड्यावर, खेचरावर,
उंटावर, गाढवावर व त्यांच्या लष्करांत असलेल्या सर्व
जनावरांवर मरी येईल.

१६ आणखी असें होईल कीं यरुशलेमावर चढाई
करून आलेल्या राष्ट्रांपैकीं अवशिष्ट राहिलेले सर्व, राजाधि-
राज सेनाधीश परमेश्वर याचें भजनपूजन करण्यासाठीं
व मंडपांचा सण पाळण्यासाठीं प्रतिवर्षी यरुशलेमास
वर जातील. १७ आणखी असें होईल कीं पृथ्वीवरील
घराण्यांपैकीं जे राजाधिराज सेनाधीश परमेश्वर याचें
भजनपूजन करण्यास यरुशलेमास जाणार नाहींत,
त्यांवर पर्जन्यवृष्टि होणार नाहीं. १८ तसेंच मिसराचें
घराणें वर चढून गेलें नाहीं तर त्याजवरहि पर्जन्यवृष्टि
होणार नाहीं; जीं राष्ट्रें मंडपांचा सण पाळण्यासाठीं वर
चढून जाणार नाहींत त्या सर्व राष्ट्रांवर परमेश्वर जी
मरी पाठविणार ती यांवरहि येईल. १९ मिसरास व
मंडपांचा सण पाळण्यास वर चढून न जाणाऱ्या
सर्व राष्ट्रांस हीच शिक्षा होईल. २० त्या दिवशीं
घोड्यांच्या घटांवर **परमेश्वराला पवित्र** अशीं
अक्षरें असतील आणि परमेश्वराच्या मंदिरांतलीं
बहुगुणीं वेदीपुढल्या यज्ञाच्या कटोऱ्यांसारखीं होतील.
२१ यरुशलेमांतील व यहूदांतील प्रत्येक बहुगुणें
सेनाधीश परमेश्वराला पवित्र होईल; व सर्व यज्ञकर्ते
येऊन तीं घेतील व त्यांत अन्न शिजवितील; त्या
दिवसापासून पुढें सेनाधीश परमेश्वराच्या मंदिरांत
कोणी व्यापारी असणार नाहीं.

१ **मुळांत** : कनानी

# मलाखी

**१** १ मलाखीच्या द्वारें इस्राएलास प्राप्त झालेलें
परमेश्वराचें वचन.

२ परमेश्वर म्हणतो, मीं तुम्हांवर प्रीति केली,
पण तुम्ही विचारितां, तूं कोणत्या बाबतींत आम्हांवर
प्रीति केली? परमेश्वर म्हणतो, एसाव याकोबाचा भाऊ
नव्हता काय? तरी मीं याकोबावर प्रीति केली; ३ एसा-
वाचा द्वेष केला, त्याचे पर्वत उजाड केले व त्याचें वतन
रानांतल्या कोल्ह्यांस दिलें. ४ अदोम म्हणाला, आमची
नासधूस झाली तरीं ओसाड झालेलीं स्थळें आम्ही पुन:
बांधूं; तर सेनाधीश परमेश्वर म्हणतो, ते बांधितील, पण
मी पाडून टाकीन; आणि लोक त्यांस दुष्टतेचा प्रदेश व
परमेश्वर ज्यावर सदा रुष्ट आहे, असें राष्ट्र म्हणतील.
५ तुमचेच डोळे पाहतील व तुम्ही म्हणाल, इस्राएलाच्या
सीमेच्याहि पलीकडे परमेश्वराचा महिमा होवो!

६ मुलगा आपल्या बापाचा व चाकर आपल्या
धन्याचा सन्मान करितो; मी बाप आहें तर माझा
सन्मान कोठें आहे? मी धनी आहें तर माझें
भय कोठें आहे, असें त्याच्या नामाचा अपमान कर-
णाऱ्या तुम्हां याजकांस परमेश्वर विचारतो. तरी तुम्ही
म्हणतां, आम्हीं तुझ्या नामाचा कोणत्या प्रकारें अपमान
केला? ७ तुम्ही माझ्या वेदीवर विटाळलेली भाकर चढ-
वितां; तरी तुम्ही विचारितां, आम्हीं कोणत्या प्रकारें तुला
विटाळविलें? तुम्ही म्हणतां, परमेश्वराचें मेज तुच्छ आहे;
असें तुम्ही बोलतां तेणेंकरूनच तुम्ही तें विटाळवितां.
८ तुम्ही आंधळा पशु अर्पितां, हा अधर्म नव्हे काय?
लंगडा किंवा रोगी असा बलि देतां, हा अधर्म नव्हे
काय? असलें अर्पण आपल्या प्रांताधिकाऱ्यास देऊन तर
पाहा; तो तुजवर प्रसन्न होईल काय? अथवा तुजवर
त्याची मर्जी बसेल काय, असें सेनाधीश परमेश्वर
म्हणतो. ९ आतां परमेश्वरानें आम्हांवर करुणा करावी
म्हणून देवाचा अनुग्रह मागा; तुमच्या हातून हें घडलें
आहे; तुमच्या या कृत्यामुळें तो कोणावर प्रसन्न होईल
काय, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो. १० तुम्हीं
माझ्या वेदीवर निरर्थक अग्नि पेटवूं नये म्हणून
तुमच्यांतला कोणी दरवाजे बंद करील तर बरें!
सेनाधीश परमेश्वर म्हणतो, तुमच्यांत मला मुळींच संतोष
नाहीं; तुमच्या हातचें यज्ञार्पण मला मान्य नाहीं.
११ कारण सूर्याच्या उगवतीपासून मावळतीपर्यंत
राष्ट्रांमध्यें माझें नाम थोर आहे, माझ्या नामाप्रीत्यर्थ
प्रतिस्थलीं धूप जाळितात व निर्दोष बलि अर्पितात;
कारण माझें नाम राष्ट्रांमध्यें थोर आहे असें सेनाधीश
परमेश्वर म्हणतो; १२ पण तुम्ही म्हणतां, परमेश्वराचें
मेज विटाळिलें आहे, त्याचें उत्पन्न, त्याचें अन्न हीं
तुच्छ आहेत; अशानें तुम्ही माझ्या नामाची अप्रतिष्ठा
करितां. १३ तुम्ही असेंहि म्हणतां, काय पीडा ही!
तुम्ही नाक मुरडितां, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो;
लुटून आणिलेला, लंगडा किंवा रोगी, असा पशु आणून
तुम्ही अर्पितां; तुमच्या हातचें असलें अर्पण मला पसंत
होईल काय, असें परमेश्वर म्हणतो. १४ आपल्या
कळपांत नर असून त्याचा नवस केल्यावर कोणी सदोष
पशूचा यज्ञ करितो; असा फसविणारा शापित असो.
मी थोर राजा आहें व राष्ट्रांत माझ्या नामाची भीति
धरितात, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.

२ १ आतां याजकहो, तुम्हांस ही आज्ञा होत
आहे; २ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, माझ्या
नामाचा महिमा व्हावा यासाठीं तुम्हीं ऐकून मन
लावलें नाहीं तर मी तुम्हांवर शाप पाठवीन व तुमचे
आशीर्वाद शाप करीन; तुम्ही लक्ष पुरवीत नाहीं म्हणून
मी त्यांस शापरूप करून चुकलों आहें. ३ पाहा, मी
तुमच्या शेतांतलें बीं निर्जीव करीन, तुमच्या यज्ञपशूंची
विष्ठा तुमच्या मुखांस फासीन; लोक विष्ठेबरोबर तुम्हां-
सहि फेकून देतील. ४ लेव्याबरोबर माझा करार कायम
व्हावयासाठीं ही आज्ञा मीं तुम्हांकडे पाठविली आहे हें
तुम्हांस समजेल, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.
५ मीं त्याजबरोबर केलेला करार जीवनाचा व शांतीचा
होता; त्यानें भय धरावें म्हणून मीं तीं त्यास दिलीं होतीं;
आणि त्याला माझी भीति वाटली व माझ्या नामाचा
त्याला धाक वाटला. ६ त्याच्या मुखांत सत्याचें धर्मशास्त्र
होतें, त्याच्या वाणींत कुटिलता आढळली नाहीं; तो
माझ्याबरोबर शांतीनें व सरळतेनें वागला व त्यानें
बहुतांस अधर्मापासून वळविलें. ७ कारण याजकाच्या
वाणीच्या ठायीं ज्ञान असावें, त्याच्या तोंडून धर्मशास्त्र
ऐकण्यास लोकांनीं आतुर असावें; कारण तो सेनाधीश
परमेश्वराचा निरोप्या आहे; ८ पण तुम्ही मार्ग सोडून
गेलां आहां, धर्मशास्त्राच्या मार्गांत पुष्कळांस ठोकर
खाण्यास तुम्हीं लाविलें आहे; तुम्हीं लेव्याचा करार
बिघडविला आहे, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.
९ ह्यास्तव मीं तुम्हांस सर्व लोकांपुढें तुच्छ व नीच
केलें आहे, कारण तुम्ही माझ्या मार्गांनीं चालत नाहीं
व माणसांची मुरवत धरून न्याय करितां.

१० आम्हां सर्वांचा एकच पिता नाहीं काय?
एकाच देवानें आम्हांस उत्पन्न केलें नाहीं काय?
असें असतां आम्ही आपापल्या बंधूंचा विश्वासघात करून

१ पाठभेद: तुमचा हात निर्जीव करीन.

आपल्या पूर्वजांचा करार कां मोडितों बरें ?
११ यहूदा विश्वासघात करीत आहे, इस्राएलांत व
यरुशलेमांत एक अमंगळ प्रकार घडला आहे; म्हणजे
यहूदानें परमेश्वराला प्रिय असलेलें त्याचें पवित्र-
स्थान भ्रष्ट केलें आहे, व परक्या दैवताच्या कन्येबरोबर
विवाह केला आहे. १२ जो मनुष्य असें करितो तो हांक
मारणारा असो, उत्तर देणारा असो, किंवा सेनाधीश
परमेश्वराला यज्ञार्पण करणारा असो, त्याला परमेश्वर
याकोबाच्या डेऱ्यांतून नाहींसें करील. १३ तसेंच
आसवें गाळणें, रडणें व उसासे टाकणें यांनीं परमे-
श्वराच्या वेदीला तुम्हीं इतकें झाकून टाकिलें आहे कीं तो
यज्ञार्पणाकडे ढुंकून पाहत नाहीं; तुमच्या हातून तें
आवडीनें घेत नाहीं. १४ तुम्ही म्हणतां, असें कां ?
कारण तुझ्यामध्यें व तुझ्या तारुण्यांतल्या स्त्रीच्यामध्यें
परमेश्वर साक्षी आहे; ती तर तुझी सहकारिणी व
तुझी कराराची पत्नी असून तूं तिजबरोबर विश्वासघातानें
वर्तला आहेस. १५ ज्याच्या ठायीं आत्म्याचा थोडा तरी
अंश आहे अशा कोणींहि असें कधीं केलें नाहीं; देवास
अनुसरणाऱ्या संततीची इच्छा करणारा कोणी आहे काय ?
याकरितां आपल्या आत्म्याला जपावें, व आपल्या तरुण-
पणाच्या पत्नीचा कोणीं विश्वासघात करूं नये. १६ परमे-
श्वर, इस्राएलाचा देव म्हणतो, मला सूटपत्राचा तिटकारा
आहे; सेनाधीश परमेश्वर म्हणतो, जो आपल्या पत्नी-
बरोबर क्रूरतेनें वागतो त्याचा मी द्वेष करितों; तर तुम्ही
आपल्या आत्म्यास जपा, विश्वासघातानें वागूं नका.
१७ तुम्हीं आपल्या भाषणानें परमेश्वरास कंटाळा
आणिला, तरी तुम्ही म्हणतां, आम्हीं कशानें त्याला कंटाळा
आणिला ? तुम्ही म्हणतां, प्रत्येक दुष्कर्मी इसम परमे-
श्वराच्या दृष्टीनें चांगला आहे व तो त्यांच्यासंबंधानें
संतुष्ट असतो, नाहीं तर न्याय करणारा देव आहे कोठें ?
अशानें तुम्हीं त्यास कंटाळा आणिला.

३ १ पाहा, मजपुढें मार्ग तयार करण्यासाठीं मी आपला
निरोप्या पाठवितों; ज्या प्रभूला तुम्ही शोधितां तो
एकाएकीं आपल्या मंदिरांत येईल; पाहा, करार घेऊन
येणाऱ्या निरोप्याची तुम्ही अपेक्षा करीत आहां तो येत
आहे, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो. २ त्याच्या आग-
मनाच्या दिवशीं कोण निभावेल ? तो प्रगट होईल तेव्हां
कोण टिकेल ? कारण तो धातु गाळणाऱ्याच्या अग्नी-
सारखा, परटाच्या खारासारखा आहे; ३ रुपें गाळून
शुद्ध करणाऱ्यासारखा तो बसेल, लेवीच्या वंशजांस
शुद्ध करील; त्यांस सोन्यारुप्याप्रमाणें शुद्ध करील,
मग ते धर्मानें परमेश्वराला बलि अर्पण करितील.
४ पूर्वीच्या दिवसांप्रमाणें, प्राचीन वर्षांप्रमाणें यहूदा
व यरुशलेम यांचें यज्ञार्पण परमेश्वराला आवडेल.
५ मी न्याय करावयाला तुम्हांकडे येईन, आणि
जादुगीर, व्यभिचारी, खोटे साक्षी यांच्याविरुद्ध आणि
मजुरांची मजुरी अडकवून ठेवणारे, विधवा व
अनाथ यांजवर जुलूम करणारे, आणि मला न भितां
परक्याला न्याय मिळूं न देणारे यांच्याविरुद्ध साक्ष
देण्याची मी त्वरा करीन, असें सेनाधीश परमेश्वर
म्हणतो. ६ कारण मी परमेश्वर बदलणारा नव्हें; म्हणून
याकोब वंशजहो, तुम्ही नष्ट झाला नाहीं.
७ तुमच्या पूर्वजांच्या दिवसांपासून माझे विधि
तुम्हीं मोडिले, ते पाळिले नाहींत. मजकडे वळा म्हणजे
मी तुम्हांकडे वळेन, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.
तुम्ही म्हणतां, आम्हीं कोणत्या बाबतींत वळावें ?
८ मनुष्य देवाला ठकवील काय ? तुम्हीं तर मला ठक-
विलें आहे; असें असून तुम्ही म्हणतां, आम्हीं कोणत्या
बाबतींत तुला ठकविलें आहे ? दशमांश व अर्पणें
यांसंबंधानें. ९ तुम्ही शापानें शापग्रस्त आहां, कारण
तुम्ही अवघ्या राष्ट्रानें मला फसविलें आहे. १० सेनाधीश
परमेश्वर म्हणतो, माझ्या मंदिरांत अन्न असावें म्हणून
सगळा दशमांश तुम्ही भांडारांत आणा, म्हणजे मी
आकाशकपाटें उघडून जागा पुरणार नाहीं एवढा आशी-
र्वाद तुम्हांकरितां वर्षितों कीं नाहीं याविषयीं माझी
प्रतीति पाहा. ११ तुमच्या भूमीच्या पिकाची नासाडी
होऊं नये म्हणून तें खाऊन टाकणाऱ्यास तुम्हांसाठीं
धमकावीन; तुमच्या बागेंतील द्राक्षालतांचें फळ

१ मुळांत : वस्त्राबरोबर

१ अथवा : दिव्यदूताची

अकालीं गळणार नाहीं, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.
१२ सर्व राष्ट्रें तुम्हांला धन्य म्हणतील; कारण तुमची
भूमि मनोरम होईल, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो.

१३ परमेश्वर म्हणतो, तुम्हीं मजबरोबर कठोर भाषण
केलें आहे; तरी तुम्ही म्हणतां, आम्ही तुजविरुद्ध काय
बोललों? १४ तुम्ही म्हणालां, देवाची सेवा करणें
व्यर्थ आहे; त्यानें आज्ञापिल्याप्रमाणें आम्हीं केलें व
सेनाधीश परमेश्वरापुढें आम्ही शोकवस्त्रें धारण करून
चाललों यापासून लाभ काय? १५ आतां आम्ही
गर्विष्ठांस सुखी म्हणतों; दुराचारी संपन्न झाले आहेत;
त्यांनीं देवाची परीक्षा पाहिली तरी त्यांचा निभाव
लागला आहे.

१६ तेव्हां परमेश्वराचें भय बाळगणारे एकमे-
कांस बोलले; तें परमेश्वरानें कान देऊन ऐकलें,
व परमेश्वराचें भय धरणारे व त्याच्या नामाचें चिंतन
करणारे यांची एक स्मरणवही त्याजसमोर लिहिण्यांत
आली; १७ सेनाधीश परमेश्वर म्हणतो, मी नेमीन त्या
दिवशीं ते माझा खास निधि होतील; जसा कोणी आपली
सेवाचाकरी करणाऱ्यां पुत्रावर दया करितो तसा मी
त्यांजवर दया करीन. १८ मग तुम्ही वळाल आणि
धार्मिक व दुष्ट यांच्यांतला आणि देवाची सेवा करणारा
व सेवा न करणारा यांच्यांतला भेद तुम्हांला कळेल.

४ १ पाहा, भट्टीसारखा तप्त दिवस येत आहे; सर्व
गर्विष्ठ व सर्व दुराचारी घसकट बनतील; तो येणारा
दिवस त्यांस जाळून टाकील, त्यांचें मूळ, फांदी वगैरे
कांहींच राहूं देणार नाहीं, असें सेनाधीश परमेश्वर म्हणतो;
२ पण तुम्ही जे माझ्या नामाचें भय धरणारे त्या तुम्हांवर
न्याय्यत्वाचा सूर्य उदय पावेल, त्याच्या पंखांच्या ठायीं
आरोग्य असेल; तुम्ही गोठ्यांतल्या वत्सांप्रमाणें बाहेर
पडून बागडाल. ३ तुम्ही दुष्टांस तुडवाल; कारण मी हें
करीन त्या दिवशीं ते तुमच्या पायांच्या तळव्यां-
खालीं राखेप्रमाणें होतील, असें सेनाधीश परमेश्वर
म्हणतो.

४ माझा सेवक मोशे याला सर्व इस्राएलांसाठीं
म्हणून होरेबांत मीं दिलेलें धर्मशास्त्र, म्हणजे अर्थात् नियम
व निर्णय, यांचें स्मरण ठेवा. ५ पाहा, परमेश्वराचा मोठा
व भयंकर दिवस येण्यापूर्वी मी एलीया संदेष्ट्यास तुम्हां-
कडे पाठवीन. ६ तो वडिलांचें हृदय त्यांच्या पुत्रांकडे
व पुत्रांचें हृदय त्यांच्या वडिलांकडे वळवील; मी येऊन
भूमीला शापानें ताडण करावें असें न होवो.

# मत्तयकृत शुभवर्तमान

~~~

### येशूची वंशावळी

१ येशू ख्रिस्त जो दाविदाचा पुत्र, जो अब्रा-
१ हामाचा पुत्र, त्याची वंशावळी.
२ अब्राहामाला इसहाक हा पुत्र झाला; इसहा-
ाला याकोब; याकोबाला यहूदा व त्याचे भाऊ झाले;
यहूदास तामारेपासून पेरेस व जेरह झाले; पेरे-
ाला हेस्रोन झाला; हेस्रोनाला अराम झाला; ४ अरा-
ाला अम्मीनादाब; अम्मीनादाबाला नहशोन; नहशो-
ाला सल्मोन; ५ सल्मोनाला राहाबेपासून बवाज; बवा-
ास रूथेपासून ओबेद; ओबेदाला इशाय; ६ आणि इशा-
ाला दावीद राजा झाला.
जी पूर्वी उरीयाची बायको होती तिजपासून दावीद
जाला शलमोन झाला; ७ शलमोनाला रहबाम;
हबामाला अबीया; अबीयाला आसा; ८ आसाला
होशाफाट; यहोशाफाटाला योराम; योरामाला उज्जीया;
उज्जीयाला योथाम; योथामाला आहाज; आहाजाला
ज्कीया; १० हिज्कीयाला मनश्शे; मनश्शाला आमोन;
ामोनाला योशीया; ११ आणि योशीयाला यखन्या व
ाचे भाऊ हे बाबेलास देशांतर झालें तेव्हां झाले.
१२ बाबेलास देशांतर झाल्यावर यखन्याला शल्ती-
ल झाला; शल्तीएलाला जरूब्बाबेल; १३ जरूब्बा-
ेलाला अबीहूद; अबीहूदाला एल्याकीम; एल्याकीमाला
ज्जुर; १४ अज्जुराला सादोक; सादोकाला याखीम;
खीमाला एलीहूद; १५ एलीहूदाला एलाजार; एला-
राला मत्तान; मत्तानाला याकोब; १६ आणि याको-
ला योसेफ झाला. ज्या मरीयेपासून ख्रिस्त म्हटलेला
ू जन्मला तिचा हा पति.
१७ याप्रमाणें अब्राहामापासून दाविदापर्यंत सर्व मिळून
दा पिढ्या; दाविदापासून बाबेलास देशांतर होईपर्यंत
दा पिढ्या; आणि बाबेलास देशांतर झाल्यापासून
ख्रिस्तापर्यंत चवदा पिढ्या.

### येशूचा जन्म

१८ येशू ख्रिस्ताचा जन्म या प्रकारें झाला. त्याची
आई मरीया हिचें योसेफास वाग्दान झाल्यावर त्यांचा
सहवास होण्यापूर्वी ती पवित्र आत्म्यापासून गरोदर
झालेली अशी दिसण्यांत आली. १९ तिचा नवरा
योसेफ धार्मिक असून तिचा उघड अपमान करावयाची
त्याची इच्छा नसल्यामुळें तिला गुप्तपणें सोडण्याचा
त्यानें निश्चय केला. २० तो त्या गोष्टींच्या विचारांत
आहे तों, पाहा, प्रभूच्या दूतानें त्याला स्वप्नांत दर्शन
देऊन म्हटलें, योसेफा, दाविदाच्या पुत्रा, तूं आपली
स्त्री मरीया हिचा स्वीकार करावयाला भिऊं नको, कारण
तिच्या ठायीं जो गर्भ आहे तो पवित्र आत्म्यापासून
आहे. २१ ती पुत्र प्रसवेल, आणि तूं त्याचें नांव येशू
ठेव, कारण तोच आपल्या लोकांस त्यांच्या पापांपासून
तारील. २२ हें सर्व यासाठीं झालें कीं प्रभूनें संदे-
ष्ट्याच्या द्वारें जें सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें; तें असें
कीं, २३ पाहा, कुमारी गर्भवती होऊन पुत्र प्रसवेल
व त्याला इम्मानुएल म्हणतील;
या नांवाचा अर्थ, आम्हांबरोबर देव, असा आहे.
२४ तेव्हां झोपेंतून उठल्यावर योसेफानें त्याला प्रभूच्या
दूतानें आज्ञा दिल्याप्रमाणें केलें; त्यानें आपल्या स्त्रीचा
स्वीकार केला, २५ तरी ती पुत्र प्रसवे तोंपर्यंत त्याची
व तिची ओळख झाली नव्हती; त्यानें त्याचें नांव
येशू ठेविलें.

### ज्ञानी लोक येशू बाळाच्या दर्शनास येतात

१ हेरोद राजाच्या दिवसांत यहूदीयांतील बेथल-
२ हेमांत येशू जन्मल्यानंतर, पाहा, पूर्वेकडून मागी लोक
यरुशलेमास येऊन विचारूं लागले कीं २ यहूद्यांचा
राजा जन्मला तो कोठें आहे? कारण आम्हीं पूर्वे-
~~~

देशेस त्याचा तारा पाहून त्याला नमन करावयास
आलों आहों. ३ हें ऐकून हेरोद राजा व त्यासहित सर्व
यरुशलेम हीं घाबरलीं; ४ आणि त्यानें लोकांचे सर्व
मुख्य याजक व शास्त्री यांस जमवून विचारिलें कीं,
ख्रिस्ताचा जन्म कोठें व्हावा? ५ ते त्याला म्हणाले,
यहूदीयांतील बेथलहेमांत; कारण संदेष्ट्याच्या द्वारें असें
लिहिलें आहे:

६ हे बेथलहेमा, यहूदाच्या प्रांता,
तूं यहूदाच्या सर्व सरदारांमध्यें कनिष्ठ आहेस असें
मुळींच नाहीं;
कारण माझ्या इस्राएल लोकांस पाळील
असा सरदार तुझ्यांतून निघेल.

७ तेव्हां हेरोदानें मागी लोकांस गुप्तपणें बोलावून
त्यांपासून तारा दिसत असल्याचा काळ नीट विचारून
घेतला, ८ आणि त्यांस बेथलहेमास पाठवितांना म्हटलें,
तुम्ही जाऊन त्या बाळकाविषयीं बारकाईनें शोध करा;
व शोध लागल्यावर मला कळवा, म्हणजे मीहि येऊन
त्याला नमन करीन. ९ राजाचें हें बोलणें ऐकून ते
निघाले, आणि पाहा, जो तारा त्यांनीं पूर्वदिशेस पाहिला
होता तो, जेथें बाळक होतें, त्या जागेच्या वर जाऊन
थांबेपर्यंत त्यांच्यापुढें चालला. १० तो तारा पाहून त्यांस
अतिशय आनंद झाला. ११ घरांत जाऊन त्यांनीं बाळ-
कास त्याची आई मरीया इच्याजवळ पाहिलें, पायां पडून
त्याला नमन केलें, आणि आपल्या द्रव्यांच्या थैल्या
सोडून सोनें, ऊद व गंधरस हीं दानें त्याला अर्पिलीं.
१२ मग हेरोदाकडे परत जाऊं नये अशी त्यांस स्वप्नांत
सूचना झाल्यामुळें, ते दुसऱ्या मार्गानें स्वदेशास गेले.

### मिसर देशास पलायन

१३ ते गेल्यावर, पाहा, प्रभूचा दूत योसेफास स्वप्नांत
दर्शन देऊन म्हणाला, ऊठ, बाळक व त्याची आई यांस
घेऊन मिसर देशास पळून जा, आणि मी तुला तेथून
जाण्यास सांगेन तोंपर्यंत तेथें ऐस; कारण बाळकाचा
घात करावयास हेरोद त्याचा शोध करणार आहे. १४ मग
तो उठून बाळक व त्याची आई यांस रात्रीं घेऊन मिसर
देशांत निघून गेला; १५ आणि हेरोदाच्या मरणापर्यंत
तेथें राहिला; 'मीं आपल्या पुत्राला मिसर देशांतून
बोलाविलें आहे,' असें जें प्रभूनें संदेष्ट्याच्या द्वारें सांगितलें
होतें तें पूर्ण व्हावें म्हणून असें झालें.

### बेथलहेम येथील मुलांची हेरोद कत्तल करतो

१६ तेव्हां मागी लोकांनीं आपणाला फसविलें हें
पाहून हेरोद अतिशय रागावला, आणि जो काळ त्यानें
मागी लोकांपासून नीट विचारून घेतला होता त्या काळा-
प्रमाणें त्यानें बेथलहेमांत व त्याच्या सर्व सीमांत जे दोन
वर्षांचे व त्यांहून कमी वयाचे बाळक होते त्या सर्वांस
माणसें पाठवून त्यांजकडून जिवें मारविलें.
१७, १८ रामा येथें रडणें व मोठा आकांत यांचा शब्द
ऐकण्यांत आला,

राहेल आपल्या मुलांकरितां रडत आहे,
आणि तीं नाहींत म्हणून ती सांत्वन पावेना,

असें जें यिर्मया संदेष्ट्याच्या द्वारें सांगितलें होतें तें त्या
समयीं पूर्ण झालें.

### मिसराहून परत येणें

१९ पुढें हेरोद मरण पावल्यावर, पाहा, प्रभूचा दूत
मिसर देशांत योसेफास स्वप्नांत दर्शन देऊन म्हणाला, २०
ऊठ, बाळकास व त्याच्या आईस घेऊन इस्राएलाच्या
देशांत जा, कारण बाळकाचा जीव घ्यावयास जे पाहत
होते ते मेले आहेत. २१ तेव्हां तो उठून बाळक व
त्याची आई यांस घेऊन इस्राएलाच्या देशांत आला; २२
परंतु अर्खेलाव हा आपला बाप हेरोद याच्या जागीं
यहूदीयांत राज्य करीत आहे, हें ऐकून तो तेथें जाण्यास
भ्याला; आणि स्वप्नांत सूचना झाल्यामुळें तो गालील
प्रांतांत निघून गेला, २३ व नासरेथ नांवाच्या गांवीं
जाऊन राहिला; यासाठीं कीं 'त्याला नासोरी म्हणतील' हें
जें संदेष्ट्यांच्या द्वारें सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें.

### बाप्तिस्मा करणारा योहान आणि त्याचा संदेश

३ १ त्या दिवसांत बाप्तिस्मा करणारा योहान यहूदी-
याच्या रानांत प्रगट होऊन असा उपदेश करिता
झाला कीं २ पश्चात्ताप करा, कारण स्वर्गाचें राज्य
जवळ आलें आहे.
३ अरण्यांत घोषणा करणाराची वाणी झाली कीं

प्रभूचा मार्ग सिद्ध करा,
त्याच्या वाटा नीट करा,

असें ज्याविषयीं यशया संदेष्ट्याच्या द्वारें सांगितलें होतें
तो हाच. ४ या योहानाचें वस्त्र उंटाच्या केसांचें होतें,
त्याच्या कमरेस कातड्याचा कमरबंद होता, आणि त्याचा
आहार टोळ व रानमध होता. ५ तेव्हां यरुशलेम, सर्व
यहूदीया व यार्देनेच्या आसपासचा अवघा प्रांत त्याजकडे
लोटला. ६ त्यांनीं आपलीं पापें पदरीं घेऊन यार्देन नदींत
त्याजपासून बाप्तिस्मा घेतला; ७ परंतु परूशी व सदूकी
यांच्यापैकीं बहुत जणांस आपणाकडे बाप्तिस्म्यासाठीं
येतांना पाहून त्यानें त्यांस म्हटलें, अहो सापांच्या पिलांनो,
होणाऱ्या क्रोधापासून पळावयास तुम्हांला कोणीं सुचविलें ?
८ यास्तव पश्चात्तापास योग्य असें फळ द्या; ९ आणि
अब्राहाम आमचा बाप आहे, असें म्हणण्याची कल्पना
आपल्या मनांत आणूं नका; कारण मी तुम्हांस सांगतों,
देव अब्राहामासाठीं या दगडांपासून मुलें उत्पन्न करावयास
समर्थ आहे; १० आणि आतांच झाडांच्या मुळाशीं कुऱ्हाड
ठेवलेली आहे; जें जें झाड चांगलें फळ देत नाहीं तें तें
तोडून अग्नींत टाकिलें जातें. ११ मी पाण्यानें तुमचा
बाप्तिस्मा पश्चात्तापासाठीं करितों; परंतु जो माझ्या मागून
येतो तो मजपेक्षां समर्थ आहे, त्याच्या वाहणा घेऊन
चालावयास मी योग्य नाहीं; तो पवित्र आत्म्यानें व अग्नीनें
तुमचा बाप्तिस्मा करील. १२ त्याचें सूप त्याच्या हातांत
आहे, तो आपलें खळें अगदीं निर्मळ करील; आपले गहूं
कोठारांत साठवील पण भूस न विझत्या अग्नीनें जाळून
टाकील.

## येशूचा बाप्तिस्मा

१३ तेव्हां येशू योहानापासून बाप्तिस्मा घेण्याकरितां
गालीलाहून यार्देनेवर त्याजकडे आला; १४ परंतु योहान
त्याला मना करून म्हणाला, मीं आपणापासून बाप्तिस्मा
घ्यावा, असें असतां आपण मजकडे येतां काय ? १५ येशूनें
त्याला उत्तर दिलें, आतां हें होऊं दे; कारण या प्रकारें
सर्व धर्म पूर्णपणें पाळणें हें आपणांला योग्य आहे. तेव्हां
त्यानें त्याच्या म्हणण्याप्रमाणें होऊं दिलें. १६ मग बाप्तिस्मा
घेतल्यावर येशू पाण्यांतून लागलाच वर आला आणि
पाहा, आकाश उघडलें; तेव्हां त्यानें देवाचा आत्मा कबुतरा-
सारखा उतरतांना व आपणावर येतांना पाहिला; १७
आणि पाहा, अशी आकाशवाणी झाली कीं हा माझा पुत्र,
मला परमप्रिय, याजवर मी संतुष्ट आहें.

## अरण्यांत येशूची परीक्षा

४ १ तेव्हां सैतानाकडून येशूची परीक्षा व्हावी
म्हणून आत्म्यानें त्याला रानांत नेलें. २ मग तो
चाळीस दिवस व चाळीस रात्री उपाशीं राहिल्यानंतर
त्याला भूक लागली. ३ तेव्हां परीक्षक त्याजजवळ
येऊन म्हणाला, तूं देवाचा पुत्र असलास तर या धोंड्यांच्या
भाकरी व्हाव्या अशी आज्ञा कर; ४ परंतु त्यानें असें उत्तर
दिलें कीं,

मनुष्य केवळ भाकरीनें नाहीं,
तर देवाच्या मुखांतून निघणाऱ्या
प्रत्येक वचनानें वांचेल,

असें लिहिलें आहे. ५ मग सैतानानें त्याला पवित्र नगरांत
नेऊन मंदिराच्या कंगोऱ्यावर उभें केलें, ६ आणि त्याला
म्हटलें, तूं देवाचा पुत्र असलास तर खालीं उडी टाक,
कारण असें लिहिलें आहे,

तो आपल्या दूतांस तुजविषयीं आज्ञा करील,
आणि तुझ्या पायांला धोंड्यांची ठेंच
लागूं नये म्हणून
ते तुला हातांवर झेलून धरतील.

७ येशूनें त्याला म्हटलें, आणखी असें लिहिलें आहे
कीं, ‘ प्रभु जो तुझा देव त्याची परीक्षा पाहूं नको. ’
८ नंतर सैतानानें त्याला एका मोठ्या उंच डोंगरावर नेऊन
जगांतील सर्व राज्यें व त्यांचें वैभव त्याला दाखविलें;
९ आणि त्याला म्हटलें, तूं पायां पडून मला नमन
करिशील तर मी हें सर्व तुला देईन. १० तेव्हां येशू
त्याला म्हणाला, अरे सैताना, निघून जा, कारण

प्रभु तुझा देव याला नमन कर,
व केवळ त्याचीच उपासना कर,

असें लिहिलें आहे. ११ मग सैतान त्याला सोडून गेला;
आणि पाहा, देवदूतांनीं येऊन त्याची सेवा केली.

### गालीलांतील कफर्णहूम येथें येशू जाऊन राहतो

१२ नंतर योहान बंदींत पडला आहे हें ऐकून येशू गालीलांत निघून गेला; १३ आणि नासरेथ सोडून जबुलून व नफताली यांच्या हद्दींत असलेल्या समुद्रतीरावरील कफर्णहूमास जाऊन राहिला; १४ यासाठीं कीं यशया संदेष्ट्याच्या द्वारें जें सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें; तें असें कीं, १५ जबुलून प्रांत व नफताली प्रांत, समुद्रतीरींचा,

यार्देनेच्या पलीकडचा देश,
विदेशी लोकांचा गालील,

१६ अशा अंधकारांत बसलेल्या लोकांनीं मोठा प्रकाश पाहिला, आणि मृत्यूच्या प्रदेशांत व छायेंत
बसलेल्यांवर ज्योति उगवली आहे.

### येशू उपदेश करण्यास आरंभ करतो

१७ तेव्हांपासून येशू उपदेश करीत बोलूं लागला कीं पश्चात्ताप करा, कारण स्वर्गाचें राज्य जवळ आलें आहे.

### प्रथम शिष्यांचें पाचारण

१८ नंतर गालील समुद्राच्या कांठीं चालत असतां, त्यानें पेत्र म्हटलेला शिमोन व त्याचा भाऊ अंद्रिया या दोघां भावांस समुद्रांत पाग टाकितांना पाहिलें; ते मासे धरणारे होते. १९ त्यानें त्यांस म्हटलें, माझ्यामागें चला, म्हणजे मी तुम्हांस मनुष्यें धरणारे करीन. २० मग ते लागलेंच जाळीं सोडून देऊन त्याच्यामागें चालले. २१ तेथून पुढें गेल्यावर त्यानें दुसरे दोघे भाऊ म्हणजे जब्दीचा पुत्र याकोब व त्याचा भाऊ योहान यांस आपला बाप जब्दी याच्याबरोबर तारवांत आपलीं जाळीं नीट करितांना पाहिलें, आणि त्यानें त्यांस बोलाविलें. २२ मग ते तारूं व आपला बाप यांस लागलेंच सोडून त्याच्यामागें चालले.

### त्याची गालीलांतील फेरी व काम

२३ नंतर येशू सभास्थानांत शिक्षण देत, राज्याची सुवार्ता गाजवीत आणि लोकांतले सर्व प्रकारचे रोग व सर्व प्रकारचीं दुखणीं बरीं करीत सर्व गालीलभर फिरला; २४ आणि त्याची कीर्ति सूरिया देशभर पसरली; तेव्हां ज्यांस नाना प्रकारचे रोग व वेदना लागल्या होत्या, जे भूतग्रस्त, फेंपरेकरी व पक्षघाती होते अशा सर्व दुखणेकऱ्यांस त्याजकडे आणिलें, आणि त्यानें त्यांस बरें केलें. २५ मग गालील, दकापलीस, यरुशलेम, यहूदीया व यार्देनेच्या पलीकडचा देश यांतून लोकांचे थव्यांचे थवे त्याच्यामागें चालले.

### “ डोंगरावरलें प्रवचन ”

५ १ तेव्हां लोकसमुदायांस पाहून तो डोंगरावर गेला, व खालीं बसल्यावर त्याचे शिष्य त्याच्याजवळ आले.

२ मग तो तोंड उघडून त्यांस शिकवूं लागला कीं,

### धन्यवाद

३ जे आत्म्यानें ‘ दीन ’ ते धन्य, कारण स्वर्गाचें राज्य त्यांचें आहे.

४ ‘ जे शोक करितात ’ ते धन्य, कारण ‘ त्यांस सांत्वन प्राप्त होईल. ’

५ ‘ जे सौम्य ’ ते धन्य, कारण ‘ त्यांस पृथ्वीचें वतन मिळेल. ’

६ जे धार्मिकतेचे भुकेले व तान्हेले ते धन्य, कारण ते तृप्त होतील.

७ जे दयाळू ते धन्य, कारण त्यांजवर दया करण्यांत येईल.

८ ‘ जे अंतःकरणाचे शुद्ध ’ ते धन्य, कारण ते देवाला पाहतील.

९ जे शांति करणारे ते धन्य, कारण त्यांस देवाचे पुत्र म्हणतील.

१० धार्मिकतेकरितां ज्यांचा छळ झाला आहे ते धन्य, कारण स्वर्गाचें राज्य त्यांचें आहे. ११ जेव्हां माझ्यामुळें लोक तुमची निंदा व छळ करितील आणि तुम्हांविरुद्ध सर्व प्रकारचें वाईट लबाडीनें बोलतील तेव्हां तुम्ही धन्य. १२ आनंद व उल्हास करा, कारण स्वर्गांत तुमचें प्रतिफळ मोठें; तुम्हांपूर्वी जे संदेष्टे होऊन गेले त्यांचा त्यांनीं तसाच छळ केला.

### मिठावरून व दिव्यावरून शिकविलेले धडे

१३ तुम्ही पृथ्वीचें मीठ आहां; जर मिठाचा खारटपणाच गेला तर त्याला खारटपणा कशानें येईल ? तें बाहेर टाकण्यांत येऊन माणसांच्या पायाखालीं तुडविलें जावें याशिवाय कोणत्याहि उपयोगाचें नाहीं. १४ तुम्ही जगाचा प्रकाश आहां; डोंगरावर वसलेलें नगर लपत

नाहीं; १५ दिवा लावून मापाखालीं ठेवीत नाहींत, दिव-
ठणीवर ठेवितात, म्हणजे तो घरांतील सर्वांवर उजेड
पाडितो; १६ त्याप्रमाणें तुमचा उजेड लोकांपुढें पडो,
यासाठीं कीं त्यांनीं तुमचीं चांगलीं कामें पाहावीं, आणि
तुमच्या स्वर्गांतील पित्याचें गौरव करावें.

### जुनें नियमशास्त्र व येशूची शिकवण

१७ नियमशास्त्र व संदेष्ट्यांचे ग्रंथहीं रद्द करावयास मी
आलों असें समजूं नका; रद्द करावयास नाहीं, तर पूर्ण
करावयास आलों आहें. १८ मी तुम्हांस खचीत सांगतों,
आकाश व पृथ्वी नाहींतशीं होतपर्यंत सर्व गोष्टी पूर्ण
झाल्यावांचून नियमशास्त्राची एक मात्रा किंवा एक बिंदु
नाहींसा होणार नाहीं. १९ यास्तव जो कोणी या अगदीं
लहान आज्ञांतील एक रद्द करील व तदनुसार लोकांस
शिकवील त्याला स्वर्गाच्या राज्यांत अगदीं लहान
म्हणतील; आणि जो कोणी त्या पाळील व शिकवील
त्याला स्वर्गाच्या राज्यांत मोठा म्हणतील. २० मी तुम्हांस
सांगतों, शास्त्री व परूशी यांच्यापेक्षां तुमची धार्मिकता
अधिक झाल्यावांचून स्वर्गाच्या राज्यांत तुमचा प्रवेश
होणारच नाहीं.

### राग व खून

२१ 'मनुष्यहत्त्या करूं नको,' आणि जो कोणी
मनुष्यहत्त्या करील तो न्यायसभेच्या दंडास पात्र होईल,
असें प्राचीन लोकांस सांगितलें होतें हें तुम्हीं ऐकलें आहे.
२२ मी तर तुम्हांस सांगतों, जो कोणी आपल्या भावावर
[उगाच] रागावेल तो न्यायसभेच्या दंडास पात्र होईल;
जो कोणी आपल्या भावाला, अरे वेडगळा, असें म्हणेल
तो वरिष्ठ सभेच्या दंडास पात्र होईल; आणि जो कोणी
त्याला, अरे मूर्खा, असें म्हणेल, तो अग्निनरकाच्या
दंडास पात्र होईल. २३ यास्तव तूं आपलें दान
अर्पिण्यास वेदीजवळ आणीत असतां, आपण आपल्या
भावाचे अपराधी आहों असें तेथें तुला स्मरण आलें, २४
तर तेथेंच वेदीपुढें आपलें दान तसेंच ठेव आणि निघून
जा; प्रथम आपल्या भावाबरोबर समेट कर, मग येऊन
आपलें दान अर्पण कर. २५ तूं आपल्या वादीबरोबर
वाटेंत आहेस तोंच त्याबरोबर लवकर समेट कर; नाहींतर
कदाचित् वादी तुला न्यायाधीशाच्या हातीं देईल, न्याया-
धीश तुला शिपायाच्या हातीं देईल, आणि तूं बंदिशाळेंत
पडशील. २६ मी तुला खचीत सांगतों, तूं दमडीन्-
दमडी फेडशील तोंपर्यंत तिच्यांतून सुटणारच नाहींस.

### अशुद्धता

२७ 'व्यभिचार करूं नको' म्हणून सांगितलें होतें, हें
तुम्हीं ऐकलें आहे. २८ मी तर तुम्हांस सांगतों, जो कोणी
स्त्रीकडे कामदृष्टीनें पाहतो त्यानें आपल्या अंतःकरणानें
तिजबरोबर व्यभिचार केलाच आहे. २९ तुझा उजवा
डोळा तुला अडखळवितो तर तो उपटून टाकून दे;
कारण तुझें संपूर्ण शरीर नरकांत टाकलें जावें यापेक्षां
तुझ्या एका अवयवाचा नाश व्हावा यांत तुझें बरें
आहे. ३० तुझा उजवा हात तुला अडखळवितो तर तो
तोडून टाकून दे; कारण तुझें संपूर्ण शरीर नरकांत पडावें
यापेक्षां तुझ्या एका अवयवाचा नाश व्हावा यांत तुझें बरें
आहे. ३१ 'कोणी आपली बायको टाकिली तर त्यानें
तिला सूटपत्र द्यावें,' हेंहि सांगितलें होतें. ३२ मी तर
तुम्हांस सांगतों कीं जो कोणी आपली बायको व्यभि-
चाराच्या कारणावांचून टाकितो तो तिला व्यभिचारिणी
करितो; आणि जो कोणी अशा टाकिलेल्या स्त्रीबरोबर
लग्न करितो तो व्यभिचार करितो.

### शपथा व खरेपण

३३ 'खोटी शपथ वाहूं नको,' तर 'आपल्या शपथा
प्रभूपुढें खऱ्या कर' म्हणून प्राचीन लोकांस सांगितलें होतें,
हेंहि तुम्हीं ऐकलें आहे. ३४ मी तर तुम्हांस सांगतों,
शपथ म्हणून वाहूंच नका; 'स्वर्गाची' नका, कारण 'तो
देवाचें सिंहासन आहे;' ३५ 'पृथ्वीचीहि' नका, कारण
'ती त्याचें पादासन आहे;' यरुशलेमाचीहि नका, कारण
तें 'थोर राजाचें नगर' आहे. ३६ आपल्या मस्तकाचीहि
शपथ वाहूं नको, कारण तुझ्यानें एकहि केस पांढरा किंवा
काळा करवत नाहीं. ३७ तर तुमचें बोलणें होय तर होय,
किंवा नाहीं तर नाहीं, एवढेंच असावें; याहून जें अधिक
तें वाइटापासून आहे.

३८ 'डोळ्याबद्दल डोळा' व 'दांताबद्दल दांत' असें

सांगितलें होतें हें तुम्हीं ऐकलें आहे. ३९ मी तर तुम्हांस
सांगतों, दुष्टाला अडवूं नका; जो कोणी तुझ्या उजव्या
गालावर मारील त्याजकडे दुसरा गाल कर. ४० जो तुजवर
फिर्याद करून तुझी बंडी घेऊं पाहतो, त्याला तुझा
अंगरखाहि घेऊं दे; ४१ आणि जो कोणी तुला वेठीस
धरून एक कोस नेईल त्याजबरोबर दोन कोस जा. ४२
जो तुजजवळ मागतो त्याला दे, आणि जो तुजपासून
उसनें घेऊं पाहतो त्याला पाठमोरा होऊं नको.

### प्रेम व सर्वांगपूर्ण शील

४३ 'आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर' व आपल्या
वैऱ्याचा द्वेष कर, असें सांगितलें होतें तें तुम्हीं ऐकलें
आहे. ४४ मी तर तुम्हांस सांगतों, तुम्ही आपल्या वैऱ्यां-
वर प्रीति करा, आणि जे तुमचा छळ करितात त्यांच्यासाठीं
प्रार्थना करा; ४५ म्हणजे तुम्ही आपल्या स्वर्गांतील
पित्याचे पुत्र व्हाल; कारण तो वाइटांवर व चांगल्यांवर
आपला सूर्य उगवितो, आणि धार्मिकांवर व अधार्मिकांवरहि
पाऊस पाडितो. ४६ जे तुम्हांवर प्रीति करितात त्यांजवर
तुम्ही प्रीति करितां तर तुम्हांला काय प्रतिफळ ? जकात-
दारहि तसेंच करितात कीं नाहीं ? ४७ आणि तुम्ही आपल्या
भाऊबंदांस मात्र सलाम करितां तर त्यांत विशेष काय
करितां ? विदेशीहि तसेंच करितात कीं नाहीं ? ४८ यास्तव
जसा तुमचा स्वर्गीय पिता पूर्ण आहे, तसे 'तुम्ही पूर्ण व्हा.'

### गुप्त दानधर्म

६ १ मनुष्यांनीं पाहावें या हेतूनें तुम्ही आपलें
धर्माचरण त्यांच्यासमोर न करण्याविषयीं जपा; केलें
तर तुमच्या स्वर्गांतील पित्याजवळ तुम्हांस प्रतिफळ
नाहीं. २ यास्तव तूं धर्म करितोस तेव्हां मनुष्यांनीं आपली
कीर्ति वर्णावी म्हणून ढोंगी जसे सभास्थानांत व रस्त्यांत
आपणांपुढें करणा वाजवितात, तसें करूं नको. मी तुम्हांस
खचीत सांगतों कीं त्यांस आपलें प्रतिफळ भरून मिळालें
आहे. ३ तूं तर धर्म करितोस तेव्हां तुझा उजवा हात
काय करितो हें तुझ्या डाव्या हाताला कळूं नये; ४ यासाठीं
कीं तुझें धर्म करणें गुप्तपणें व्हावें, म्हणजे तुझा गुप्तदर्शी
पिता तुला फळ देईल.

### गुप्त प्रार्थना

५ तसेंच तुम्ही प्रार्थना करितां तेव्हां ढोंग्यांसारिखे
होऊं नका; कारण मनुष्यांनीं आपणांस पाहावें म्हणून
सभास्थानांत व चवाठ्यांवर उभें राहून प्रार्थना करणें त्यांस
आवडतें. मी तुम्हांस खचीत सांगतों कीं ते आपलें प्रति-
फळ भरून पावले आहेत. ६ तूं तर प्रार्थना करितोस तेव्हां
'आपल्या खोलींत जा, व दार लावून' अगल्या गुप्तवासी
पित्याची 'प्रार्थना कर' म्हणजे तुझा गुप्तदर्शी पिता तुला
फळ देईल. ७ तुम्ही प्रार्थना करितां तेव्हां विदेश्यांसारखी
व्यर्थ बडबड करूं नका; आपल्या बहुभाषणामुळें आपलें
मागणें मान्य होईल असें त्यांस वाटतें. ८ तुम्ही त्यांच्या-
सारिखे होऊं नका, कारण तुम्हांस जें कांहीं अवश्य आहे
तें तुम्हीं मागण्यापूर्वी तुमच्या पित्याला कळतें.

### प्रभूची प्रार्थना

९ यास्तव या प्रकारें प्रार्थना करा : हे आमच्या स्वर्गां-
तील पित्या, तुझें नाम पवित्र मानिलें जावो. १० तुझें
राज्य येवो. जसें स्वर्गांत तसें पृथ्वीवरहि तुझ्या इच्छेप्रमाणें
होवो, ११ आमची रोजची भाकर आज आम्हांस दे; १२
आणि जसें आम्हीं आपल्या ऋण्यांस ऋण सोडिलें आहे
तशीं तूं आमचीं ऋणें आम्हांस सोड, १३ आणि आम्हांस
परीक्षेंत आणूं नको; तर आम्हांस वाइटापासून सोडीव.
[कारण कीं राज्य, सामर्थ्य आणि गौरव हीं सर्वकाळ तुझीं
आहेत; आमेन.] १४ जर तुम्ही मनुष्यांच्या अपराधांची
क्षमा करितां तर तुमचा स्वर्गीय पिता तुम्हांस क्षमा करील;
१५ परंतु जर तुम्ही मनुष्यांच्या अपराधांची क्षमा करीत
नाहीं, तर तुमचा पिता तुमच्या अपराधांची क्षमा
करणार नाहीं.

### उपास

१६ तुम्ही उपास करितां तेव्हां ढोंग्यांसारिखे म्लानमुख
होऊं नका, कारण आपणांस उपास आहे असें मनुष्यांस
दिसावें म्हणून ते आपलें तोंड विरूप करितात. मी तुम्हांस
खचीत सांगतों कीं ते आपलें प्रतिफळ भरून पावले
आहेत. १७ तूं तर उपास करितोस तेव्हां आपल्या
डोक्याला तेल लाव, व आपलें तोंड धू; १८ यासाठीं
कीं तूं उपास करितोस हें मनुष्यांस दिसावें म्हणून नव्हे,

तर तुझा गुप्तवासी पिता याला दिसावें, म्हणजे तुझा
गुप्तदर्शी पिता तुला फळ देईल.

## खरीखुरी संपत्ति

१९ पृथ्वीवर आपणांकरितां संपत्ति सांठवूं नका; तेथें
कसर व जंग खाऊन नाश करितात, आणि चोर घर फोडून
चोरी करितात; २० तर स्वर्गांत आपणांकरितां संपत्ति
सांठवा; तेथें कसर व जंग खाऊन नाश करीत नाहींत, व
चोर घर फोडून चोरी करीत नाहींत; २१ कारण जेथें
तुमची संपत्ति आहे तेथें तुमचें चित्तहि असणार.

## प्रकाश आणि अंधार

२२ डोळा शरीराचा दिवा आहे; यास्तव तुझा डोळा
निर्दोष असला तर तुझें संपूर्ण शरीर प्रकाशमय होईल;
२३ पण तुझा डोळा सदोष असला तर तुझें संपूर्ण शरीर
अंधकारमय होईल; यास्तव तुझ्यांतील प्रकाश अंधार
असला तर तो अंधार केवढा! २४ कोणाच्यानें दोन
धन्यांची चाकरी करवत नाहीं, कारण तो एकाचा द्वेष
करील व दुसऱ्यावर प्रीति करील; अथवा एकाशीं निष्ठेनें
वागेल व दुसऱ्याला तुच्छ मानील. तुमच्यानें देवाची
आणि धनाचीहि सेवा करवत नाहीं.

## चिंता आणि देवावर भाव

२५ यास्तव मी तुम्हांस सांगतों कीं आपल्या जीवा-
विषयीं, म्हणजे आपण काय खावें व काय प्यावें; आणि
आपल्या शरीराविषयीं, म्हणजे आपण काय पांघरावें; अशी
काळजी करूं नका. अन्नापेक्षां जीव व वस्त्रापेक्षां शरीर
विशेष आहे कीं नाहीं? २६ आकाशांतील पाखरें लक्षपूर्वक
पाहा; तीं पेरीत नाहींत, कापीत नाहींत, व कोठारांत
सांठवीत नाहींत; तरी तुमचा स्वर्गीय पिता त्यांस खावयास
देतो; तुम्ही त्यांपेक्षां श्रेष्ठ आहां कीं नाहीं? २७ काळजी
करून आपल्या आयुष्याची दोरी हातभर वाढवावयास
तुम्हांतील कोण समर्थ आहे? २८ तसेंच वस्त्राविषयीं कां
काळजी करितां? रानांतील भूकमळें कशीं वाढतात हें
लक्षांत आणा; तीं कष्ट करीत नाहींत व कातीत नाहींत;
२९ तरी मी तुम्हांस सांगतों कीं शलमोन देखील आपल्या
सर्व वैभवांत त्यांतल्या एकासारिखा सजला नव्हता. ३०
जें रानांतलें गवत आज आहे व उद्यां भट्टींत पडतें त्याला
जर देव असा पोषाख घालतो, तर, अहो अल्पविश्वासी,
तो विशेषेंकरून तुम्हांस पोषाख घालणार नाहीं काय? ३१
यास्तव काय खावें, काय प्यावें, काय पांघरावें, असें म्हणत
काळजी करीत बसूं नका. ३२ कारण हीं सर्व मिळविण्यास
विदेशी लोक खटपट करितात; या सर्वांची गरज तुम्हांस
आहे हें तुमच्या स्वर्गीय पित्यास ठाऊक आहे. ३३ तर
तुम्ही प्रथम त्याचें राज्य व त्याची धार्मिकता मिळवावयाची
खटपट करा, म्हणजे यांबरोबर तींहि सर्व तुम्हांस मिळतील.
३४ यास्तव उद्याची काळजी करूं नका, कारण उद्यांची
काळजी उद्यां; ज्या दिवसाचें दुःख त्या दिवसाला पुरे.

## इतरांचे गुणदोष काढण्याबाबत

७ १ तुमचा न्याय होऊं नये म्हणून तुम्ही न्याय
करूं नका; २ कारण ज्या प्रकारचा तुम्ही न्याय कराल
त्या प्रकारचा तुमचा न्याय होईल आणि ज्या मापानें
तुम्ही माप घालितां त्याच मापानें तुमच्या पदरीं पडेल. ३
तूं आपल्या डोळ्यांतलें मुसळ ध्यानांत न आणितां आपल्या
भावाच्या डोळ्यांतलें कुसळ कां पाहतोस? ४ अथवा
तुझ्या डोळ्यांतलें कुसळ मला काढूं दे असें तूं आपल्या
भावाला कसें म्हणशील? पाहा, तुझ्या डोळ्यांत तर मुसळ
आहे. ५ अरे ढोंग्या, पहिल्यानें आपल्या डोळ्यांतलें मुसळ
काढ, म्हणजे आपल्या भावाच्या डोळ्यांतलें कुसळ काढा-
वयास तुला स्पष्ट दिसेल.

६ जें पवित्र तें कुत्र्यांस घालूं नका, आणि आपलीं
मोत्यें डुकरांपुढें टाकूं नका; टाकाल तर तीं त्यांस पायां-
खालीं तुडवितील व उलटून तुम्हांस फाडितील.

## प्रार्थना करावयास प्रोत्साहन

७ मागा म्हणजे तुम्हांस दिलें जाईल, शोधा
म्हणजे तुम्हांस सांपडेल, ठोका म्हणजे तुम्हांस
उघडलें जाईल; ८ कारण जो कोणी मागतो त्याला
मिळतें, जो शोधितो त्याला सांपडतें व जो ठोकितो त्यास
उघडलें जाईल. ९ आपल्या पुत्रानें भाकर मागितली तर
त्याला धोंडा देईल, १० आणि मासा मागितला तर त्याला
साप देईल, असा तुम्हांमध्यें कोण मनुष्य आहे? ११
यास्तव तुम्ही वाईट असतां आपल्या मुलांस चांगल्या
देणग्या देण्याचें समजतां, तर तुमच्या स्वर्गांतील पित्या-

जवळ जे मागतात त्यांस तो किती विशेषेकरून चांगल्या
देणग्या देईल ?

## सुवर्ण नियम

१२ यास्तव लोकांनी जसें तुम्हांबरोबर वर्तन करावें
म्हणून तुमची इच्छा आहे तसेंच तुम्ही त्यांबरोबर वर्तन
करा, कारण नियमशास्त्र व संदिष्टशास्त्र यांचें सार हेंच आहे.

## दोन रस्ते

१३ अरुंद दरवाजानें आंत जा; कारण नाशाकडे
जाण्याचा दरवाजा रुंद व मार्ग पसरट आहे, आणि त्यांतून
आंत जाणारे बहुत आहेत; १४ जीवनाकडे जाण्याचा
दरवाजा अरुंद व मार्ग संकोचित आहे, आणि ज्यांस तो
सांपडतो ते थोडके आहेत.

## खरे व खोटे शिक्षक

१५ खोट्या संदेष्ट्यांविषयीं जपा. ते मेंढरांच्या वेषानें
तुम्हांकडे येतात, तरी अंतरीं क्रूर लांडगे आहेत. १६
तुम्ही त्यांच्या फळांवरून त्यांस ओळखाल. कांटेरी झाडां-
वरून द्राक्षें, किंवा रिंगणीच्या झाडांवरून अंजीर काढितात
काय ? १७ त्याप्रमाणें प्रत्येक चांगलें झाड चांगलें फळ देतें,
आणि वाईट झाड वाईट फळ देतें. १८ चांगल्या झाडाला
वाईट फळें येत नाहींत, आणि वाईट झाडाला चांगलीं फळें
येत नाहींत. १९ जें जें झाड चांगलें फळ देत नाहीं तें तें
तोडून अग्नींत टाकण्यांत येतें. २० यास्तव तुम्ही त्यांच्या
फळांवरून त्यांस ओळखाल.

## उक्ति आणि कृति

२१ मला प्रभुजी, प्रभुजी, असें म्हणणाऱ्या प्रत्येकाचा
प्रवेश स्वर्गाच्या राज्यांत होईल असें नाहीं; तर जो माझ्या
स्वर्गीय पित्याच्या इच्छेप्रमाणें वर्ततो त्याचा होईल. २२
त्या दिवशीं मला बहुत म्हणतील, प्रभुजी, प्रभुजी, 'आम्हीं
तुमच्या नांवानें संदेश दिला,' तुमच्या नांवानें भुतें
घालविलीं, व तुमच्या नांवानें बहुत अद्भुत कृत्यें केलीं
नाहींत काय ? २३ तेव्हां मी त्यांस स्पष्ट सांगेन कीं
माझी तुमची कधींच ओळख नव्हती; 'अहो अधर्म
करणाऱ्यांनो, मजपुढून निघून जा.'

## दोन पाये

२४ यास्तव जो प्रत्येक जण माझीं हीं वचनें ऐकून
त्यांप्रमाणें वर्ततो तो कोणाएका शहाण्या मनुष्यासारखा
ठरेल; त्यानें आपलें घर खडकावर बांधिलें; २५ मग
पाऊस पडला, पूर आला, वाराहि सुटला, व त्या घरास
लागला; तरी तें पडलें नाहीं; कारण त्याचा पाया खडकावर
घातला होता. २६ तसेंच जो प्रत्येक जण माझीं हीं वचनें
ऐकून त्यांप्रमाणें वर्तत नाहीं तो कोणाएका मूर्ख मनुष्यासा-
रिखा ठरेल; त्यानें आपलें घर वाळूवर बांधिलें, २७ मग
पाऊस पडला, पूर आला, वाराहि सुटला, व त्या घरास
लागला; तेव्हां तें कोसळलें व फारच जोरानें पडलें.

२८ येशूनें हीं वचनें समाप्त केल्यावर असें झालें कीं
लोकसमुदाय त्याच्या शिक्षणावरून थक्क झाले; २९ कारण
तो त्यांच्या शास्त्र्यांप्रमाणें नव्हे तर अधिकारसंपन्न
असल्यासारखें त्यांस शिकवीत असे.

## महारोग्यास बरें करणें

१ मग तो डोंगरावरून उतरल्यावर लोकांचे
८ थव्यांचे थवे त्याच्यामागें चालले. २ तेव्हां पाहा,
एक कुष्ठरोगी येऊन त्याच्या पायां पडून म्हणाला,
प्रभुजी, आपली इच्छा असली तर मला शुद्ध करावयास
आपण शक्तिमान् आहां. ३ तेव्हां त्यानें हात पुढें करून
त्याला स्पर्श केला व म्हटलें, माझी इच्छा आहे, शुद्ध हो;
तेव्हांच त्याचें कुष्ठ जाऊन तो शुद्ध झाला. ४ मग येशूनें
त्याला म्हटलें, संभाळ, कोणाला सांगूं नको; तर जाऊन
आपणास 'याजकाला दाखीव,' आणि त्यांस प्रमाण पटावें
म्हणून मोशानें जें अर्पण नेमिलें आहे तें वाहा.

## जमादाराच्या चाकरास बरें करणें

५ मग येशू कफर्णहूमास आल्यावर कोणाएका जमादा-
रानें त्याजकडे येऊन त्यास अशी विनंति केली कीं, ६
प्रभुजी, माझा चाकर पक्षघातानें अतिशय पीडित होऊन
घरांत पडला आहे. ७ तो त्याला म्हणाला, मी येऊन
त्याला बरें करीन. ८ तेव्हां जमादारानें उत्तर दिलें कीं,
प्रभुजी, आपण माझ्या छपराखालीं यावें अशी माझी
योग्यता नाहीं; पण शब्द मात्र बोला, म्हणजे माझा चाकर
बरा होईल. ९ कारण मीहि ताबेदार मनुष्य असून माझ्या
स्वाधीन शिपाई आहेत; मीं एकाला जा म्हटलें म्हणजे तो
जातो, दुसऱ्याला ये म्हटलें म्हणजे तो येतो, आणि आपल्या

दासाला अमुक कर म्हटलें म्हणजे तो तें करितो. १० हें
ऐकून येशूला आश्चर्य वाटलें व आपल्यामागें आलेल्यांस तो
म्हणाला, मी तुम्हांस खचीत सांगतों, एवढा विश्वास मला
इस्राएलांतहि आढळला नाहीं. ११ मी तुम्हांस सांगतों कीं;
‘पूर्वेकडून व पश्चिमेकडून’ बहुत लोक येतील, आणि
अब्राहाम, इसहाक व याकोब यांजबरोबर स्वर्गाच्या राज्यांत
बसतील; १२ परंतु राज्याचे पुत्र बाहेरच्या अंधारांत
टाकिले जातील, तेथें रडणें व दांतखाणें चालेल. १३
मग येशू जमादाराला म्हणाला, जा; तूं विश्वास धरल्या-
प्रमाणें तुला प्राप्त होवो. त्याच घटकेस तो चाकर बरा झाला.

## शिमोनाची सासू व इतर पुष्कळ रोगी यांस बरें करणें

१४ नंतर येशू पेत्राच्या घरांत गेल्यावर त्याची सासू
तापानें पडली आहे असें त्यानें पाहिलें. १५ तेव्हां त्यानें
तिच्या हाताला स्पर्श केल्यावर तिचा ताप निघाला;
आणि तीं उठून त्याची सेवा करूं लागली. १६ मग
संध्याकाळ झाल्यावर लोकांनीं बहुत भूतग्रस्तांस त्याजकडे
आणिलें; तेव्हां त्यानें भूतें शब्दानेंच घालविलीं, व सर्व
दुखणाइतांस बरें केलें.

१७ त्यानें स्वतः आमचे विकार घेतले
आणि आमचे रोग वाहिले,

असें जें यशया संदेष्ट्याच्या द्वारें सांगितलें होतें तें पूर्ण
व्हावें म्हणून असें झालें.

## शिष्य होऊं इच्छिणाऱ्या माणसांस लावावयाच्या कसोट्या

१८ मग येशूनें आपल्यासभोंवतीं लोकसमुदाय आहे
असें पाहून त्यांस पलीकडे जाण्यास आज्ञा केली. १९
तेव्हां कोणीएक शास्त्री येऊन त्याला म्हणाला, गुरुजी,
जेथें कोठें आपण जाल तेथें मी आपल्यामागें येईन. २०
येशूनें त्याला म्हटलें, खोकडांस बिळें व आकाशांतील
पाखरांस कोटीं आहेत, परंतु मनुष्याच्या पुत्राला डोकें
टेकावयास ठिकाण नाहीं. २१ मग त्याच्या शिष्यांतील
आणखी एक जण त्याला म्हणाला, प्रभुजी, मला पहि-
ल्यानें आपल्या बापाला पुरावयास जाऊं द्या. २२ येशूनें
त्याला म्हटलें, तूं माझ्यामागें ये; आणि मेलेल्यांस आपल्या
मेलेल्यांना पुरूं दे.

## वादळ शांत करणें

२३ मग तो तारवावर चढल्यानंतर त्याचे शिष्य
त्याच्यामागें त्यांत गेले. २४ तेव्हां पाहा, समुद्रांत मोठें
वादळ उठलें, तें इतकें कीं तारूं लाटांनीं झाकूं लागलें;
तो तर झोपेंत होता. २५ तेव्हां ते त्याच्याजवळ येऊन
त्याला जागें करून म्हणाले, प्रभुजी, बचाव करा, आपण
बुडतों. २६ त्यानें त्यांस म्हटलें, अहो अल्पविश्वासी,
तुम्ही कां घाबरलां ? मग त्यानें उठून वारा व समुद्र यांस
दटाविलें; आणि अगदीं निवांत झालें. २७ तेव्हां तारवां-
तील मनुष्यांना आश्चर्य वाटून तीं म्हणालीं, हा कसा मनुष्य
आहे ? वारा व समुद्रहि याचें ऐकतात !

## गदरेकरांमधील भूतग्रस्त

२८ मग तो पलीकडे गदरेकरांच्या देशांत गेल्यावर
दोन भूतग्रस्त मनुष्यें कबरांतून निघून येत असतांना त्याला
भेटलीं; तीं इतकीं उग्र होतीं कीं त्या वाटेनें कोणाच्यानें
जाववत नसे. २९ तेव्हां पाहा, तीं ओरडून म्हणालीं, हे
देवाच्या पुत्रा, आमचा व तुझा काय संबंध ? नेमलेल्या
समयापूर्वीं तूं आम्हांस पीडावयास येथें आलास काय ?
३० तेथें त्यांजपासून दूर अंतरावर डुकरांचा मोठा कळप
चरत होता. ३१ मग त्या भूतांनीं त्याला विनंति केली कीं
तूं जर आम्हांस काढीत असलास तर आम्हांस त्या डुक-
रांच्या कळपांत पाठीव. ३२ त्यानें त्यांस म्हटलें, जा. मग
तीं निघून डुकरांत शिरलीं; आणि पाहा, तो अवघा कळप
कड्यावरून समुद्रांत धडक धावत जाऊन पाण्यांत बुडून
मेला. ३३ मग चारणारे पळाले आणि त्यांनीं नगरांत
जाऊन भूतग्रस्तांच्या गोष्टीसकट सर्व वर्तमान जाहीर केलें.
३४ तेव्हां पाहा, सर्व नगर येशूला भेटावयास निघालें,
आणि त्याला पाहून, आपण आमच्या सीमेबाहेर जावें
अशी त्यांनीं त्याला विनंति केली.

## पक्षघाती मनुष्याला बरें करणें

९ १ तेव्हां तो तारवांत बसून पलीकडे गेला व
आपल्या नगरास पोहोंचला. २ मग पाहा, खाटेवर
पडलेल्या कोणीएका पक्षघाती मनुष्यास त्याजकडे
आणिलें, तेव्हां येशू त्यांची श्रद्धा पाहून पक्षघाती मनुष्यास

म्हणाला, मुला, धीर धर; तुझ्या पापांची क्षमा झाली
आहे. ३ मग पाहा, कित्येक शास्त्री आपल्या मनांत
म्हणाले, हा दुर्भाषण करितो. ४ येशू त्यांच्या कल्पना ओळ-
खून म्हणाला, तुम्ही आपल्या अंतःकरणांत वाईट कल्पना
कां आणितां? ५ कारण तुझ्या पापांची क्षमा झाली आहे
असें बोलणें, किंवा उठून चाल असें बोलणें, यांतून
कोणतें सोपें? ६ तरी पण पृथ्वीवर पापांची क्षमा कराव-
यास मनुष्याच्या पुत्राला अधिकार आहे हें तुम्हांस सम-
जावें म्हणून—( मग तो पक्षघाती मनुष्याला म्हणतो ) ऊठ,
आपली बाज उचलून घेऊन घरीं जा. ७ मग तो उठून
आपल्या घरीं गेला. ८ हें पाहून लोकसमुदाय भ्याले,
आणि ज्या देवानें मनुष्यांस एवढा अधिकार दिला त्याचें
गौरव ते करूं लागले.

### मत्तयाला पाचारण

९ मग तेथून जातांना येशूनें मत्तय नांवाच्या मनुष्याला
जकातीच्या नाक्यावर बसलेलें पाहून त्याला म्हटलें,
माझ्यामागें ये; तेव्हां तो उठून त्याच्यामागें गेला.
१० नंतर असें झालें कीं तो घरांत जेवावयास बसला
असतां, पाहा, बहुत जकातदार व पापी लोक येऊन येशू
व त्याचे शिष्य यांच्या पंक्तीस जेवावयास बसले. ११ हें
पाहून परूशी त्याच्या शिष्यांस म्हणाले, तुमचा गुरु जका-
तदार व पापी लोक यांच्याबरोबर कां जेवतो? १२ हें
ऐकून तो म्हणाला, निरोग्यांस वैद्याची गरज नाहीं, तर
दुखणाइतांस आहे. १३ 'मला दया पाहिजे, यज्ञ नको'
याचा अर्थ काय, हें जाऊन शिका; कारण मी धार्मिकांस
नाहीं तर पापी जनांस बोलावावयास आलों.

### उपास

१४ त्या वेळेस योहानाचे शिष्य त्याजकडे येऊन
म्हणाले, आम्ही व परूशी पुष्कळ उपास करितों, तुमचे
शिष्य उपास करीत नाहींत, हें कां? १५ येशूनें त्यांस
म्हटलें, वऱ्हाड्यांच्याबरोबर वर आहे तोंपर्यंत त्यांच्यानें
शोक करवेल काय? परंतु त्यांजपासून वराला घेऊन
जाण्याचा काळ येईल, तेव्हां ते उपास करतील. १६ कोऱ्या
कापडाचें ठिगळ जुन्या वस्त्राला कोणी लावीत नाहीं; कारण
घड करण्याकरितां जें कोरें लाविलें तें जुन्याला फाडून घेतें
व भोक अधिक मोठें होतें. १७ तसेंच नवा द्राक्षारस
जुन्या बुधल्यांत कोणी घालीत नाहींत; घातला तर बुधले
फुटून द्राक्षारस सांडतो, आणि बुधले नासतात; तर नवा
द्राक्षारस नव्या बुधल्यांत घालितात, म्हणजे दोन्ही नीट
राहतात.

### याइराची कन्या व रक्तस्रावी स्त्री

१८ तो त्यांच्याबरोबर हें बोलत असतां, पाहा, कोणी-
एक अधिकारी येऊन त्याच्या पायां पडून म्हणाला, माझी
कन्या नुकतीच मरण पावली आहे, तरी आपण येऊन
आपला हात तिजवर ठेवा म्हणजे ती जीवंत होईल. १९
तेव्हां येशू उठून त्याच्याबरोबर गेला व त्याचे शिष्यहि
गेले. २० मग पाहा, बारा वर्षें रक्तस्रावानें पीडलेली एक
स्त्री त्याच्यामागें येऊन त्याच्या वस्त्राच्या गोंड्याला शिवली.
२१ कारण तिनें आपल्या मनांत म्हटलें, मी केवळ
त्याच्या वस्त्राला शिवलें तर बरी होईन. २२ तेव्हां येशूनें
मागें वळून तिला पाहून म्हटलें, मुली, धीर धर, तुझ्या
विश्वासानें तुला बरें केलें आहे; आणि ती स्त्री त्याच
घटकेस बरी झाली. २३ मग येशू अधिकाऱ्याच्या घरांत
जाऊन पावा वाजविणाऱ्यांस व गलबला करणाऱ्या लोक-
समुदायास पाहून म्हणाला, २४ वाट सोडा, कारण मुलगी
मेली नाहीं; ती झोपेंत आहे; तेव्हां त्यांनीं त्याचा उपहास
केला. २५ मग लोकसमुदायाला बाहेर लाविल्यावर आंत
जाऊन त्यानें मुलीचा हात धरिला, आणि ती उठली. २६
ह्या गोष्टीची कीर्ति त्या अवघ्या देशांत पसरली.

### दोन आंधळे

२७ मग येशू तेथून पुढें जात असतां दोन आंधळे
त्याच्यामागें चालत जाऊन मोठ्यानें बोलले, अहो दाविदाचे
पुत्र, आम्हांवर दया करा. २८ तो घरांत गेल्यावर ते
आंधळे त्याच्याजवळ आले, तेव्हां येशू त्यांस म्हणाला, हें
करावयास मी समर्थ आहें म्हणून तुम्ही विश्वास धरितां
काय? ते त्याला म्हणाले, होय प्रभू. २९ तेव्हां त्यानें
त्यांच्या डोळ्यांस स्पर्श करून, तुमच्या विश्वासाप्रमाणें
तुम्हांस प्राप्त होवो, असें म्हटलें. ३० तेव्हां त्यांचे डोळे
उघडले; मग येशूनें त्यांस निक्षून सांगितलें कीं हें कोणाला
कळूं नये म्हणून संभाळा. ३१ तरी ते तेथून निघून

आणि त्या अवघ्या देशांत त्याची कीर्ति गाजवूं लागले.

### मुका भूतग्रस्त

३२ मग ते तेथून जात असतां, पाहा, लोकांनी कोणी-
एका मुक्या भूतग्रस्ताला त्याजकडे आणिलें. ३३ त्यानें
भूत काढल्यावर तो मुका बोलूं लागला; तेव्हां लोकसमुदाय
आश्चर्यचकित होऊन म्हणाले, इस्राएलांत असें कधींहि
पाहण्यांत आलें नव्हतें; ३४ परंतु परूशी म्हणाले, हा
भूतांच्या अधिपतीच्या साह्यानें भूतें काढितो.
३५ नंतर येशू त्यांच्या सभास्थानांत शिकवीत, राज्याची
सुवार्ता गाजवीत आणि सर्व प्रकारचे रोग व सर्व प्रकारचीं
दुखणीं बरीं करीत सर्व नगरांतून व गांवांतून फिरला.

### ख्रिस्ताला लोकांचा कळवळा येतो

३६ तेव्हां लोकसमुदायांस पाहून त्यांचा त्याला कळ-
वळा आला, कारण ‘मेंढका नसलेल्या मेंढरांसारखें’ ते
रंजीस झालेले व शिणलेले होते. ३७ तेव्हां तो आपल्या
शिष्यांस म्हणाला, पीक फार, पण कामकरी थोडे आहेत;
३८ यास्तव पिकाच्या धन्यानें आपल्या कापणीस कामकरी
पाठवावे म्हणून तुम्ही त्याची प्रार्थना करा.

### बारा प्रेषितांस कामगिरीवर पाठविणें

१० १ तेव्हां त्यानें आपल्या बारा शिष्यांस जवळ
बोलावून त्यांनी अशुद्ध आत्म्यांस काढावें आणि
सर्व प्रकारचे विकार व सर्व प्रकारचीं दुखणीं
बरीं करावीं असा अधिकार त्यांस दिला.
२ त्या बारा प्रेषितांचीं नांवें अशीं आहेत: पहिला, पेत्र
म्हटलेला शिमोन, व त्याचा भाऊ अंद्रिया; जब्दीचा पुत्र
याकोब व त्याचा भाऊ योहान; ३ फिलिप्प व बर्थलमय;
थोमा व मत्तय जकातदार; अल्फीचा पुत्र याकोब व तद्दय;
४ शिमोन कनानी व त्याला धरून देणारा यहूदा इस्कर्योत.
५ या बारा जणांस येशूनें अशी आज्ञा करून पाठविलें
कीं, विदेश्यांकडे जाणाऱ्या वाटेनें जाऊं नका, व शोमरोनी
यांच्या कोणत्याहि नगरांत प्रवेश करूं नका; ६ तर इस्रा-
एलाच्या घरचीं जीं हरवलेलीं मेंढरें त्यांजकडे जा. ७ जात
असतां असा उपदेश करा कीं, स्वर्गाचें राज्य जवळ आलें
आहे. ८ रोग्यांस बरें करा, मेलेल्यांस उठवा, कुष्ठ्यांस शुद्ध
करा, भूतें काढा, तुम्हांस फुकट मिळालें आहे, फुकट द्या.
९ सोनें, रुपें किंवा तांबें आपल्या कंबरकशांत घेऊं नका;
१० वाटेसाठीं झोळणा, दुसरा अंगरखा, वहाणा, किंवा
काठी घेऊं नका, कारण कामकऱ्याचें पोषण व्हावें हें
योग्य आहे. ११ ज्या ज्या नगरांत किंवा गांवांत तुम्ही
जाल, त्यांत कोण योग्य आहे हें शोधून पाहा; आणि
तुम्ही निघून जाईपर्यंत त्याच्या येथें राहा; १२ आणि
घरांत जातांना, तुला शांति असो, असें म्हणा; १३ तें
घर योग्य असलें तर तुमची शांति त्याला प्राप्त होवो; तें
योग्य नसलें तर तुमची शांति तुम्हांकडे परत येवो. १४
जो कोणी तुमचें स्वागत करणार नाहीं, व तुमचीं वचनें
ऐकणार नाहीं, त्याच्या घरांतून किंवा नगरांतून निघतांना
आपल्या पायांची धूळ झाडून टाका. १५ मी तुम्हांस खचीत
सांगतों, न्यायाच्या दिवशीं त्या नगरापेक्षां सदोम व गमोरा
यांच्या प्रदेशाला सोपें जाईल.
१६ पाहा, लांडग्यांमध्यें मेंढरांस तसें मी तुम्हांस
पाठवितों; यास्तव तुम्ही सापांसारिखे चतुर व कबुतरांसारिखे
साळसूद व्हा. १७ मनुष्यांविषयीं जपा; कारण ते तुम्हांस
न्यायसभांच्या स्वाधीन करतील, आपल्या सभास्थानांत
तुम्हांस फटके मारतील, १८ आणि देशाधिकारी व राजे
यांस व विदेश्यांस साक्ष पटावी म्हणून तुम्हांस त्यांज-
पुढें माझ्यामुळें नेतील. १९ जेव्हां तुम्हांस स्वाधीन करि-
तील तेव्हां कसें काय बोलावें याविषयीं काळजी करूं नका,
कारण तुम्हीं काय बोलावें याची त्याच घटकेस तुम्हांस
प्रेरणा होईल. २० बोलणारे तुम्ही नाहीं, तर तुमच्या
बापाचा आत्मा हाच तुम्हांमध्यें बोलणारा आहे. २१ भाऊ
भावाला व बाप मुलाला जिवें मारण्यास धरून देईल; आणि
‘मुलें आईबापांवर उठून’ त्यांस जिवें मारितील; २२ माझ्या
नामामुळें सर्व लोक तुमचा द्वेष करितील; जो शेवटपर्यंत
टिकेल तोच तरेल. २३ जेव्हां एका नगरांत तुमचा छळ
करितील तेव्हां दुसऱ्यांत पळून जा; मी तुम्हांस खचीत
सांगतों, मनुष्याचा पुत्र येईपर्यंत इस्राएलाचीं नगरें तुम्हांस
आटोपणार नाहींत.
२४ गुरूपेक्षां शिष्य थोर नाहीं, आणि धन्यापेक्षां दास
थोर नाहीं; २५ शिष्यानें गुरुसारिखें व दासानें धन्यासारिखें

१ येशूला

व्हावें, इतकें त्यास पुरे. घरधन्यास बालजबूल म्हटलें तर
घरच्या माणसांस किती विशेषेंकरून म्हणतील ? २६
यास्तव त्यांस भिऊं नका; कारण उघडें होणार नाहीं असें
कांहीं झांकलेलें नाहीं, आणि कळणार नाहीं असें कांहीं
गुप्त नाहीं. २७ जें मी तुम्हांशीं अंधारांत बोलतों तें
उजेडांत सांगा, आणि तुमच्या कानांत सांगितलेलें जें तुम्ही
ऐकतां तें धाब्यांवरून गाजवा; २८ जे शरीराला वधितात,
पण आत्म्याला वधावयास समर्थ नाहींत त्यांस भिऊं नका,
तर आत्मा व शरीर या दोहोंचा नरकांत नाश करावयास
जो समर्थ आहे त्याला भ्या. २९ दोन चिमण्या दमडीला
विकतात कीं नाहींत ? तथापि तुमच्या बापाच्या सत्तेशिवाय
त्यांतून एकहि भूमीवर पडत नाहीं. ३० तुमच्या डोक्या-
वरले सर्व केस देखील मोजलेले आहेत. ३१ यास्तव
भिऊं नका; बहुत चिमण्यांहून तुमचें मोल अधिक आहे.
३२ जो कोणी मनुष्यांसमोर मला स्वीकारील त्याला मीहि
आपल्या स्वर्गांतील पित्यासमोर स्वीकारीन; ३३ पण जो
कोणी मनुष्यांसमोर मला नाकारील त्याला मीहि आपल्या
स्वर्गांतील पित्यासमोर नाकारीन.

३४ मी पृथ्वीवर शांतता चालवावयास आलों असें
समजूं नका; मी शांतता चालवावयास नव्हे; तर तरवार
चालवावयास आलों. ३५ कारण 'मुलगा व बाप, मुलगी
व आई, सून व सासू, यांत विरोध' पाडण्यास मी आलों;
३६ आणि 'मनुष्याच्या घरचेच लोक त्याचे वैरी होतील.'
३७ जो माझ्यापेक्षां बापावर किंवा आईवर अधिक प्रीति
करितो तो मला योग्य नाहीं; जो माझ्यापेक्षां मुलग्यावर
किंवा मुलीवर अधिक प्रीति करितो तो मला योग्य नाहीं;
३८ आणि जो आपला वधस्तंभ उचलून घेऊन माझ्यामागें
येत नाहीं तो मला योग्य नाहीं. ३९ ज्यानें आपला जीव
राखिला तो त्याला गमावील, आणि ज्यानें माझ्याकरितां
आपला जीव गमाविला तो त्याला राखील.

४० जो तुम्हांस स्वीकारितो तो मला स्वीकारितो, आणि
जो मला स्वीकारितो तो ज्यानें मला पाठविलें त्याला
स्वीकारितो. ४१ संदेष्ट्याला संदेष्टा म्हणून जो स्वीकारितो
त्याला संदेष्ट्याचें प्रतिफळ मिळेल; आणि धार्मिकाला
धार्मिक म्हणून जो स्वीकारितो त्याला धार्मिकाचें प्रतिफळ
मिळेल; ४२ आणि या लहानांतील एकाला शिष्य म्हणून
जो कोणी केवळ गार पाण्याचा एक प्याला पाजितो तो
आपल्या प्रतिफळाला मुकणारच नाहीं, असें मी तुम्हांस
खचीत सांगतों.

११ १ मग असें झालें कीं येशूनें आपल्या बारा
शिष्यांस नियम सांगणें समाप्त केल्यावर तो त्यांच्या
नगरांत शिकवावयास व उपदेश करावयास गेला.

## बाप्तिस्मा करणारा योहान

२ योहान बंदिशाळेंत असतां त्यानें ख्रिस्ताच्या कृत्यां-
विषयीं ऐकून आपल्या शिष्यांच्या हातीं निरोप पाठवून
त्याला विचारलें, ३ जे यावयाचे ते आपणच, किंवा आम्हीं
दुसऱ्याची वाट पाहावी ? ४ येशूनें त्यांस उत्तर दिलें, जें
तुम्ही ऐकतां व पाहतां तें योहानाला जाऊन सांगा; ५
'अंधळे पाहतात,' पांगळे चालतात, कुष्ठरोगी शुद्ध होतात,
बहिरे ऐकतात, मेलेलें उठतात, व 'गरिबांस सुवार्ता सांग-
ण्यांत येते;' ६ जो कोणी मजसंबंधानें अडखळत नाहीं
तो धन्य आहे.

७ ते जात असतां येशू लोकसमुदायाबरोबर योहानाला
उद्देशून बोलूं लागला : तुम्ही काय पाहावयास रानांत गेलां
होतां ? वाऱ्यानें हालविलेला बोरू काय ? ८ तर मग काय
पाहावयास गेलां होतां ? मऊ वस्त्रें ल्यालेल्या मनुष्याला
काय ? पाहा, मऊ वस्त्रें लेणारे राजगृहीं असतात. ९ तर
मग कां गेलां होतां ? संदेष्ट्याला पाहावयास काय ? मी
तुम्हांस सांगतों, हो; संदेष्ट्याहून जो श्रेष्ठ त्याला. १०
पाहा, मी आपल्या दूताला तुझ्यापुढें पाठवितों,
तो तुझा मार्ग तुझ्यासमोर सिद्ध करील,
असें ज्याविषयीं लिहिलें आहे तो हाच आहे. ११ मी
तुम्हांस खचीत सांगतों कीं स्त्रियांपासून जन्मलेल्या
माणसांमध्यें बाप्तिस्मा करणारा योहान यापेक्षां कोणी मोठा
झाला नाहीं; तरी स्वर्गाच्या राज्यांत जो कनिष्ठ तो त्याज-
हून श्रेष्ठ आहे. १२ बाप्तिस्मा करणारा योहान याच्या
दिवसांपासून आतांपर्यंत स्वर्गाच्या राज्यावर हल्ला चालला
आहे आणि जबरदस्त लोक तें नेटानें घेतात. १३ कारण सर्व
संदेष्टे व नियमशास्त्र हीं योहानापर्यंत संदेश देत आलीं.
१४ तुम्ही तो ग्रहण करण्यास मान्य असाल तर जो

एलीया येणार तो हाच आहे. १५ ज्याला ऐकावयास कान
आहेत तो ऐको. १६ या पिढीला मी कोणती उपमा देऊं?
ती मुलें बाजारांत बसून आपल्या सोबत्यांस हाक मारून
म्हणतात; १७ 'आम्हीं पावा वाजविला, तरी तुम्ही
नाचलां नाहीं, आम्हीं विलाप केला तरी तुम्ही ऊर बडवून
घेतले नाहींत,' त्यांच्यासारखी ही पिढी आहे. १८ कारण
योहान आला असून तो खातपीत नाहीं, तरी त्याला
भूत लागलें असें म्हणतात. १९ मनुष्याचा पुत्र आला,
तो खातोपितो; तरी त्याजविषयीं म्हणतात, पाहा, खादाड
व दारूबाज मनुष्य, जकातदारांचा व पापी जनांचा मित्र!
परंतु ज्ञान आपल्या कृत्यांच्या योगें न्यायी ठरलें.

### पश्चात्ताप न करणाऱ्या शहरांविषयीं काढलेले दुःखोद्गार

२० नंतर ज्या नगरांमध्यें त्याचीं पराक्रमाचीं बहुतेक
कृत्यें घडलीं होतीं त्यांनीं पश्चात्ताप केला नाहीं म्हणून त्यांस
तो असा दोष देऊं लागला: २१ हे खोराजिना, तुला
धिक्कार असो! हे बेथसैदा, तुला धिक्कार असो! कारण
तुम्हांमध्यें जीं पराक्रमाचीं कृत्यें घडलीं तीं सोर व सीदोन
यांत घडलीं असतीं तर त्यांनीं मागेंच तरट व राख अंगावर
घेऊन पश्चात्ताप केला असता. २२ यामुळें मी तुम्हांस
सांगतों कीं न्यायाच्या दिवशीं सोर व सीदोन यांस
तुम्हांपेक्षां सोपें जाईल. २३ हे कफर्णहूमा, 'तूं आकाशा-
पर्यंत चढशील काय? तूं अधोलोकापर्यंत उतरशील;'
कारण तुजमध्यें जीं पराक्रमाचीं कृत्यें घडलीं तीं सदोमांत
घडलीं असतीं तर तें आजपर्यंत राहिलें असतें. २४
यामुळें मी तुम्हांस सांगतों कीं न्यायाच्या दिवशीं तुझ्या-
पेक्षां सदोम प्रदेशास सोपें जाईल.

### बालसदृश मनोवृत्ति

२५ त्या समयीं येशू असें बोलता झाला: हे पित्या,
स्वर्गाच्या व पृथ्वीच्या प्रभू, मी तुझें स्तवन करितों;
कारण ज्ञानी व विचारवंत यांपासून या गोष्टी तूं गुप्त
ठेवून बाळकांस प्रगट केल्या. २६ खरें, हे बापा, कारण
असेंच तुला योग्य दिसलें.

### येशूची स्वतःची कामगिरी

२७ माझ्या पित्यानें माझ्या हातीं सर्व दिलें आहे,
आणि पित्यावांचून पुत्राला कोणी ओळखीत नाहीं, आणि
पुत्रावांचून व ज्या कोणास त्याला प्रगट करावयाची पुत्राची
इच्छा असेल त्यावांचून पित्याला कोणी ओळखीत नाहीं.
२८ अहो कष्टी व भाराक्रांत जनहो, तुम्ही सर्व मजकडे या,
म्हणजे मी तुम्हांला विश्रांति देईन. २९ मी जो मनाचा
सौम्य व लीन आहें त्या माझें जूं आपणांवर घ्या व मजपासून
शिका, म्हणजे 'तुमच्या जिवांस विश्रांति मिळेल;'
कारण माझें जूं सोईचें व माझें ओझें हलकें आहे.

### शब्बाथाचें पालन

१२ १ त्या दिवसांत येशू एका शब्बाथ दिवशीं
शेतांमधून गेला, तेव्हां त्याच्या शिष्यांस भूक
लागली होती, म्हणून ते कणसें तोडून खाऊं
लागले. २ हें पाहून परूशी त्याला म्हणाले, पाहा, शब्बाथ
दिवशीं जें करूं नये तें तुमचे शिष्य करितात. ३ त्यानें
त्यांस म्हटलें, दावीद व त्याच्याबरोबरचीं मनुष्यें यांस जेव्हां
भूक लागली तेव्हां त्यानें काय केलें; ४ म्हणजे तो देवाच्या
मंदिरांत कसा गेला, आणि ज्या 'समर्पित भाकरी' त्यानें
व त्याच्याबरोबरच्या माणसांनीं खाऊं नयेत, तर याजकांनीं
मात्र खाव्या त्या त्यानें कशा खाल्ल्या, हें तुमच्या वाच-
ण्यांत आलें नाहीं काय? ५ किंवा याजक मंदिरांत शब्बाथ
दिवशीं शब्बाथ मोडून निर्दोष असतात, हें नियमशास्त्रांत
तुमच्या वाचण्यांत आलें नाहीं काय? ६ तरी पण मी
तुम्हांस सांगतों कीं मंदिरापेक्षां थोर असा येथें कोणीएक
आहे. ७ 'मला दया पाहिजे, यज्ञ नको,' याचा अर्थ
तुम्ही समजला असता तर तुम्ही निर्दोष्यांस दोष लाविला
नसता; ८ कारण मनुष्याचा पुत्र शब्बाथाचा धनी आहे.

### वाळलेल्या हाताच्या मनुष्याला बरें करणें

९ नंतर तो तेथून निघून त्यांच्या सभास्थानांत गेला;
१० आणि पाहा, तेथें हात वाळलेला एक मनुष्य होता;
तेव्हां त्यांनीं त्यास दोष लावावा म्हणून त्याला विचारिलें,
शब्बाथ दिवशीं रोग बरे करणें योग्य आहे काय? ११
तो त्यांस म्हणाला, तुम्हांमध्यें असा कोण मनुष्य आहे कीं
त्याचें एकच मेंढरूं असून तें शब्बाथ दिवशीं खाचेंत पडलें
तर तो त्याला धरून बाहेर काढणार नाहीं? १२ तर
मेंढरापेक्षां मनुष्य किती श्रेष्ठ आहे? यास्तव शब्बाथ

दिवशीं सत्कर्म करणें योग्य आहे. १३ मग त्यानें त्या
मनुष्याला सांगितलें, हात लांब कर, तेव्हां त्यानें तो लांब
केला आणि तो दुसऱ्या हातासारखा चांगला झाला.

### येशूला ठार मारण्याचा कट

१४ नंतर परूश्यांनीं बाहेर जाऊन त्याचा घात कसा
करावा अशी त्याविरुद्ध मसलत केली.
१५ हें ओळखून येशू तेथून निघाला, तेव्हां बहुत
लोक त्याच्यामागें चालले; त्या सर्वांस त्यानें बरें केलें; १६
आणि मला प्रगट करूं नका असें त्यांस बजावून सांगितलें;
१७ यासाठीं कीं यशाया संदेष्ट्याच्या द्वारें जें सांगितलें
होतें तें पूर्ण व्हावें; तें असें कीं
१८ पाहा, हा माझा सेवक, याला मीं निवडिलें आहे;
तो मला परमप्रिय आहे; त्यावर माझा जीव संतुष्ट आहे;
त्यावर मी आपला आत्मा घालीन,
तो विदेश्यांस न्याय कळवील.
१९ तो भांडणार नाहीं व ओरडणार नाहीं,
व मार्गांमध्यें त्याची वाणी कोणाला ऐकूं येणार नाहीं.
२० चेपलेला बोरू तो मोडणार नाहीं,
व मिणमिणीत वात तो विझविणार नाहीं,
तो न्यायाला विजय देईल तोंपर्यंत असें होईल;
२१ आणि विदेशी त्याच्या नामाची आशा धरतील.

### सैतानाच्या साहाय्यानें येशू आपलीं कामें करतो या आरोपाला त्यानें दिलेलें उत्तर

२२ मग आंधळा व मुका असलेल्या एका भूतग्रस्ताला
त्याजकडे आणिलें, आणि त्यानें त्याला बरें केलें; तेणेंकरून
तो मुका बोलूं व पाहूं लागला. २३ तेव्हां सर्व लोक-
समुदाय थक्क होऊन म्हणाले, हा दाविदाचा पुत्र तर नसेल
ना ? २४ परंतु परूशी हें ऐकून म्हणाले, भूतांचा अधिपति
बालजबूल याच्या साहाय्यानेंच हा भूतें काढितो. २५
त्यानें त्यांच्या मनांतील कल्पना ओळखून त्यांस म्हटलें,
आपसांत फूट पडलेलें प्रत्येक राज्य ओसाड पडतें, आणि
आपसांत फूट पडलेलें प्रत्येक नगर किंवा घर टिकत नाहीं.
२६ सैतान जर सैतानाला काढितो तर त्याच्यांत फूट
पडली आहे; मग त्याचें राज्य कसें टिकेल ? २७ मी जर
बालजबूल याच्या साह्यानें भूतें काढितों तर तुमचे पुत्र
कोणाच्या साह्यानें काढितात ? यामुळें ते तुमचा न्याय-
निवाडा करितील. २८ परंतु मी जर देवाच्या आत्म्याच्या
योगानें भूतें काढितों तर देवाचें राज्य तुम्हांप्रत आलें
आहे; २९ अगर बळकट मनुष्याला पहिल्यानें बांधिल्या-
शिवाय त्याच्या घरांत शिरून त्याच्या वस्तु कोणी लुटून
न्याव्या हें कसें होईल ? त्यास बांधिलें तरच तो त्याचें घर
लुटील. ३० जो मला अनुकूल नाहीं तो मला प्रतिकूल
आहे; आणि जो माझ्याबरोबर गोळा करीत नाहीं तो उध-
ळून टाकितो. ३१ यास्तव मी तुम्हांस सांगतों कीं प्रत्येक
पाप व दुर्भाषण यांची मनुष्यांस क्षमा होईल, परंतु
पवित्र आत्म्याविषयींचें जें दुर्भाषण त्याची क्षमा होणार
नाहीं; ३२ मनुष्याच्या पुत्राविरुद्ध कोणी कांहीं बोलेल तर
त्याची त्याला क्षमा होईल, परंतु जो कोणी पवित्र आत्म्या-
विरुद्ध बोलेल त्याची त्याला क्षमा होणार नाहीं; या युगीं
नाहीं व येणाऱ्या युगींहि नाहीं. ३३ झाड चांगलें, आणि
त्याचें फळ चांगलें असें म्हणा; अथवा झाड वाईट, आणि
त्याचें फळ वाईट असें म्हणा; कारण फळांवरून झाड
कळतें. ३४ अहो सापांच्या पिलांनो, तुम्ही वाईट असतां
तुम्हांला चांगल्या गोष्टी कशा बोलतां येतील ? कारण
अंतःकरणांत जें भरून गेलें आहे तेंच मुखावाटे निघणार.
३५ चांगला मनुष्य आपल्या चांगल्या भांडारांतून चांगलें
काढितो, आणि वाईट मनुष्य आपल्या वाईट भांडारांतून
वाईट काढितो. ३६ मी तुम्हांस सांगतों कीं मनुष्यें
जो प्रत्येक व्यर्थ शब्द बोलतील त्याचा हिशेब त्यांस
न्यायाच्या दिवशीं द्यावा लागेल. ३७ कारण तूं आपल्या
बोलण्यावरून निर्दोष ठरशील, आणि आपल्या बोलण्या-
वरून सदोष ठरशील.

### चिन्ह दाखविण्याबाबत त्याला केलेली विनंति व तीस त्याचा नकार

३८ तेव्हां शास्त्री व परूशी यांतून कोणीं म्हटलें कीं
गुरुजी, आपल्या हातून झालेलें चिन्ह पाहावें अशी आमची
इच्छा आहे. ३९ त्यानें त्यांस उत्तर दिलें, दुष्ट व व्यभि-
चारी अशी पिढी चिन्ह मागते, परंतु योना संदेष्ट्या या
चिन्हावांचून तिला दुसरें चिन्ह मिळणार नाहीं. ४० कारण
जसा 'योना तीन दिवस व तीन रात्री मोठ्या माशाच्या

पोटांत होता,' तसा मनुष्याचा पुत्र तीन दिवस व तीन रात्री पृथ्वीच्या पोटांत राहील. ४१ निनवेचे लोक न्यायकाळीं या पिढीबरोबर उभे राहून इला दोषी ठरवितील, कारण त्यांनीं योनाच्या उपदेशावरून पश्चात्ताप केला; आणि पाहा, योनापेक्षां थोर असा कोणी येथें आहे. ४२ दक्षिणेची राणी न्यायकाळीं या पिढीबरोबर उठून हिला दोषी ठरवील; कारण ती शलमोनाचें ज्ञान ऐकावयास पृथ्वीच्या सीमेपासून आली; आणि पाहा, शलमोनापेक्षां थोर असा कोणी येथें आहे.

### अपुऱ्या सुधारणेपासून उद्भवणारे धोके

४३ अशुद्ध आत्मा मनुष्यांतून निघाला म्हणजे तो विश्रांति मिळावी म्हणून निर्जल स्थलीं फिरतो, परंतु ती त्याला मिळत नाहीं. ४४ मग तो म्हणतो, माझ्या ज्या घरांतून मी निघालों त्यांत परत जाईन; आणि गेल्यावर तें रिकामें असलेलें, झाडलेलें व सुशोभित केलेलें, असें त्यास आढळतें. ४५ नंतर तो जाऊन आपणापेक्षां दुष्ट असे दुसरे सात आत्मे आपणाबरोबर घेतो, आणि ते आंत जाऊन तेथें राहतात; मग त्या मनुष्याची शेवटली दशा पहिलीपेक्षां वाईट होते; तसेंच या दुष्ट पिढीचेंहि होईल.

### खरें बंधुत्व

४६ तो लोकसमुदायांबरोबर बोलत असतां पाहा, त्याची आई व त्याचे भाऊ त्याबरोबर बोलावयाच्या हेतूनें बाहेर उभे राहिले होते. ४७ तेव्हां कोणीएकानें त्याला सांगितलें, पाहा, आपली आई व आपले भाऊ आपल्याबरोबर बोलावयाची संधि पाहत बाहेर उभे राहिले आहेत. ४८ तेव्हां त्यानें सांगणाऱ्याला उत्तर दिलें, माझी आई कोण, व माझे भाऊ कोण? ४९ मग तो आपल्या शिष्यांकडे हात करून बोलला, पाहा, माझी आई व माझे भाऊ! ५० कारण जो कोणी माझ्या स्वर्गांतील पित्याच्या इच्छेप्रमाणें करितो तोच माझा भाऊ, बहीण व आई.

### पेरणी करणाऱ्याचा दृष्टांत

१३ १ त्या दिवशीं येशू घरांतून निघून समुद्राच्या काठीं जाऊन बसला. २ तेव्हां लोकांचे बहुत समुदाय त्याच्याजवळ मिळाले, म्हणून तो तारवांत जाऊन बसला, व सर्व लोक किनाऱ्यावर उभे राहिले. ३ मग त्यानें दाखल्यांनीं त्यांस बहुत गोष्टी सांगितल्या; त्या अशाः पाहा, पेरणारा पेरणी करावयास निघाला; ४ आणि तो पेरीत असतां कांहीं बीं वाटेवर पडलें, व पाखरांनीं येऊन तें खाऊन टाकलें. ५ कांहीं खडकाळीवर पडलें, तेथें त्यास फारशी माती नव्हती, आणि माती खोल नसल्यामुळें तें लवकर उगवलें; ६ मग सूर्य उगवल्यावर त्याला ऊन लागलें, व त्यास मूळ नव्हतें म्हणून तें वाळून गेलें. ७ कांहीं कांटेरी झाडांमध्यें पडलें, मग कांटेरी झाडांनीं वाढून त्याची वाढ खुंटविली. ८ कांहीं चांगल्या मातींत पडलें; मग त्याचें कोठें शंभरपट, कोठें साठपट, कोठें तीसपट, असें पीक आलें. ९ ज्याला कान आहेत तो ऐको.

### दृष्टांतांचा उपयोग

१० मग शिष्य जवळ येऊन त्याला म्हणाले, आपण त्यांबरोबर दाखल्यांनीं कां बोलतां? ११ त्यानें त्यांस उत्तर दिलें कीं स्वर्गाच्या राज्याचीं रहस्यें जाणण्याचें दान तुम्हांस दिलेलें आहे, परंतु त्यांस दिलेलें नाहीं. १२ कारण ज्या कोणाजवळ आहे त्याला मिळेल व त्याला भरपूर होईल; परंतु ज्या कोणाजवळ नाहीं त्याचें जें असेल तें देखील त्याजपासून काढून घेतलें जाईल. १३ यास्तव मी त्यांबरोबर दाखल्यांनीं बोलतों; कारण ते पाहत असतां पाहत नाहींत, आणि ऐकत असतां ऐकत नाहींत व समजतहि नाहींत. १४ यशयाचा संदेश त्यांजविषयीं पूर्ण होत आहे, तो असा कीं, तुम्ही ऐकाल तर खरें, परंतु समजणार नाहीं; व पाहाल तर खरें, परंतु तुम्हांस दिसणार नाहीं;

१५ कारण या लोकांचें अंतःकरण जड झालें आहे,
ते कानांनीं मंद ऐकतात,
आणि आपले डोळे त्यांनीं मिटले आहेत;
यासाठीं कीं त्यांनीं डोळ्यांनीं पाहूं नये;
कानांनीं ऐकूं नये,
अंतःकरणानें समजूं नये,
त्यांनीं वळूं नये,
आणि मीं त्यांस बरें करूं नये.

१६ धन्य तुमचे डोळे, कारण ते पाहतात; आणि

धन्य तुमचे कान, कारण ते ऐकतात. १७ मी तुम्हांस
खचीत सांगतों कीं तुम्ही जें पाहतां तें पाहावयास बहुत
संदेष्टे व धार्मिक जन उत्कंठित झाले, तरी त्यांच्या पाह-
ण्यांत आलें नाहीं; आणि तुम्ही जें ऐकतां तें ऐकावयास
ते उत्कंठित झाले, तरी त्यांच्या ऐकण्यांत आलें नाहीं.

## पेरणी करणाऱ्याच्या दृष्टांताचें स्पष्टीकरण

१८ आतां पेरणाऱ्याचा दाखला ऐकून घ्या. १९
कोणी राज्याचें वचन ऐकतो पण समजत नाहीं, तेव्हां तो
दुष्ट येऊन त्याच्या अंतःकरणांत पेरलेलें तें हिरावून घेतो;
वाटेवर पेरलेला तो हा आहे. २० खडकाळीवर पेरलेला
तो हा आहे कीं वचन ऐकतो, व तत्काळ तें आनंदानें
ग्रहण करतो; २१ परंतु त्यास मूळ नसल्याकारणानें तो
थोडाच वेळ टिकतो; आणि वचनामुळें संकट आलें किंवा
छळ झाला म्हणजे तो लागलाच अडखळतो. २२ कांटेरी
झाडांमध्यें जो पेरलेला तो हा आहे कीं वचन ऐकतो;
परंतु संसाराची चिंता व द्रव्याचा मोह हीं वचनाची वाढ
खुंटवितात, आणि तो निष्फळ होतो. २३ चांगल्या भूमी-
वर पेरलेला तो हा आहे कीं वचन ऐकून समजतो; तो
फळ देतोच देतो; कोणी शंभरपट, कोणी साठपट, कोणी
तीसपट, असें देतो.

## निदणाचा दृष्टांत

२४ त्यानें त्यांस दुसरा दाखला दिला कीं ज्या
मनुष्यानें आपल्या शेतांत चांगलें बीं पेरलें त्यासारिखें
स्वर्गाचें राज्य आहे. २५ लोक झोपेंत असतांना त्याचा
वैरी येऊन गव्हांमध्यें निदण पेरून गेला. २६ पण
जेव्हां पाला फुटला व दाणे आले तेव्हां निदणहि
दिसलें. २७ तेव्हां घरधन्याच्या दासांनीं येऊन त्याला
म्हटलें, महाराज, आपण आपल्या शेतामध्यें चांगलें
बीं पेरिलें ना? मग त्यांत निदण कोठून आलें?
२८ तो त्यांस म्हणाला, हें काम कोण्या वैऱ्याचें आहे.
दासांनीं त्याला म्हटलें, तर आम्हीं जाऊन तें जमा
करावें अशी आपली इच्छा आहे काय? २९ तो
म्हणाला, नाहीं; तुम्ही निदण जमा करितांना त्याबरोबर
कदाचित् गहूंहि उपटाल. ३० कापणीपर्यंत दोन्ही बरोबर
वाढूं द्या, मग कापणीच्या वेळेस मी कापणाऱ्यांस सांगेन
कीं पहिल्यानें निदण जमा करा, व जाळण्यासाठीं त्याच्या
पेंढ्या बांधा; आणि गहूं माझ्या कोठारांत सांठवा.

## मोहरीचा दाणा व खमीर यांचे दृष्टांत

३१ त्यानें त्यांस आणखी एक दाखला दिला कीं
स्वर्गाचें राज्य मोहरीच्या दाण्यासारखें आहे; तो कोणी-
एका मनुष्यानें घेऊन आपल्या शेतांत लाविला; ३२ तो
तर सर्व दाण्यांमध्यें बारीक आहे, तरी वाढल्यावर भाज्यां-
पेक्षां मोठा होऊन त्याचें असें झाड होतें कीं 'आकाशां-
तील पाखरें' येऊन 'त्याच्या फांद्यांत वस्ती करितात.'
३३ त्यानें त्यांस आणखी एक दाखला सांगितला
कीं स्वर्गाचें राज्य खमिरासारखें आहे; तें एका स्त्रीनें
घेऊन तीन मापें पिठामध्यें लपवून ठेविलें, तेणेंकरून
शेवटीं तें सर्व फुगून गेलें.
३४ हा सर्व गोष्टी येशूनें दाखल्यांनीं लोकसमुदायांस
सांगितल्या; आणि दाखल्यावांचून तो त्यांबरोबर कांहीं
बोलला नाहीं; ३५ यासाठीं कीं संदेष्ट्याच्या द्वारें जें
सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें; तें असें कीं,

मी आपलें तोंड उघडून दाखले देईन;
जगाच्या स्थापनेपासून जें गुप्त तें प्रकट करीन.

## निदणाच्या दृष्टांताचें स्पष्टीकरण

३६ नंतर तो लोकसमुदायांस निरोप देऊन घरांत
गेला आणि त्याचे शिष्य त्याजकडे येऊन म्हणाले, शेतां-
तल्या निदणाच्या दाखल्याची आम्हांस फोड करून सांगा.
३७ त्यानें उत्तर दिलें कीं चांगलें बीं पेरणारा हा मनुष्याचा
पुत्र आहे; ३८ शेत हें जग आहे; चांगलें बीं, हे राज्याचे
पुत्र आहेत; निदण हे त्या दुष्टाचे पुत्र आहेत; ३९ तें पेर-
णारा वैरी हा सैतान आहे; कापणी ही युगाची समाप्ति
आहे; आणि कापणारे हे देवदूत आहेत. ४० यास्तव जसें
निदण जमा करून अग्नींत जाळतात, तसें युगाच्या समाप्तीस
होईल. ४१ मनुष्याचा पुत्र आपल्या देवदूतांस पाठवील,
आणि ते सर्व 'अडखळविणाऱ्यांस व अधर्म करणा-
ऱ्यांस' त्याच्या राज्यांतून जमा करून ४२ त्यांस
अग्नीच्या भट्टींत टाकितील; तेथें रडणें व दांतखाणें चालेल.
४३ तेव्हां 'धार्मिक' जन आपल्या पित्याच्या राज्यांत

सूर्यासारिखे प्रकाशतील.' ज्याला कान आहेत तो ऐको.

### मोतीं, ठेव व जाळें यांचे दृष्टांत

४४ स्वर्गाचें राज्य शेतांत लपविलेल्या ठेवीसारिखें आहे; ती कोणीएका मनुष्याला सांपडल्यावर त्यानें ती लपवून ठेविली, आणि आनंदामुळें त्यानें जाऊन आपलें सर्वस्व विकलें, मग तें शेत विकत घेतलें.

४५ आणखी स्वर्गाचें राज्य चांगल्या मोत्यांचा शोध करणाऱ्या कोणीएका व्यापाऱ्यासारिखें आहे; ४६ त्याला एक अति मोलवान् मोतीं आढळल्यावर त्यानें जाऊन आपलें सर्वस्व विकलें आणि तें विकत घेतलें.

४७ आणखी स्वर्गाचें राज्य समुद्रांत टाकलेल्या ज्या जाळ्यांत सर्व प्रकारचे जीव एकत्र सांपडतात त्यासारिखें आहे; ४८ तें भरल्यावर माणसांनीं काठाकडे ओढिलें आणि त्यांनीं बसून जे चांगले ते भांड्यांत जमा केले, वाईट ते फेकून दिले. ४९ तसें युगाच्या समाप्तीस होईल; देवदूत येऊन धार्मिकांतून दुष्टांस वेगळे करितील; ५० आणि त्यांस अग्नीच्या भट्टींत टाकितील, तेथें रडणें व दांतखाणें चालेल.

५१ तुम्हांला या सर्व गोष्टी समजल्या काय? ते त्याला म्हणाले, हो. ५२ तेव्हां त्यानें त्यांस म्हटलें, जो प्रत्येक शास्त्री स्वर्गाच्या राज्याचा शिष्य झाला आहे तो आपल्या भांडारांतून नवेजुने पदार्थ काढणाऱ्या गृहस्थासारिखा आहे.

### नासरेथास येशूचा स्वीकार करण्यांत येत नाहीं

५३ नंतर असें झालें कीं हे दाखले समाप्त केल्यावर येशू तेथून गेला; ५४ आणि स्वदेशीं आल्यावर त्यानें त्यांच्या सभास्थानांत त्यांस अशी शिकवण दिली कीं ते थक्क होऊन बोलले, हें ज्ञान व हे पराक्रम याला कोठून? ५५ हा सुताराचा पुत्र ना? याच्या आईला मरीया म्हणतात ना? याकोब, योसे, शिमोन व यहूदा, हे याचे भाऊ ना? ५६ याच्या बहिणी या सर्व आपणांबरोबर नाहींत काय? तर हें सर्व याला कोठून? ५७ असे ते त्याजविषयीं अडखळले. येशूनें त्यांस म्हटलें, संदेष्ट्याला आपला देश व आपलें घर यांत मात्र सन्मान मिळत नाहीं. ५८ तेथें त्यांच्या अविश्वासामुळें त्यानें फारशीं महत्कृत्यें केलीं नाहींत.

### बाप्तिस्मा करणाऱ्या योहानाचा मृत्यु

१४ १ त्या दिवसांत मांडलिक हेरोदानें येशूची कीर्ति ऐकली; २ आणि आपल्या सेवकांस म्हटलें, हा बाप्तिस्मा करणारा योहान आहे; हा मेलेल्यांतून उठला आहे म्हणून त्याच्या ठायीं हे पराक्रम चालू आहेत. ३ कारण हेरोदानें आपला भाऊ फिलिप्प याची बायको हेरोदिया इच्यामुळें योहानाला धरून बांधून बंदिशाळेंत घातलें होतें; ४ योहानानें त्याला म्हटलें होतें कीं तूं तिला ठेवावें हें तुला योग्य नाहीं; ५ आणि तो त्याला जिवें मारावयास पाहत असतां लोकांस भ्याला, कारण ते त्याला संदेष्टा मानीत असत. ६ नंतर हेरोदाचा जन्मोत्सव आला असतां हेरोदियेच्या कन्येनें सभेंत नाच करून हेरोदाला संतुष्ट केलें. ७ त्यावरून त्यानें तिला शपथपूर्वक वचन दिलें कीं जें कांहीं तूं मागशील तें मी तुला देईन. ८ मग आईनें तिला शिकवून पुढें केल्यावरून ती म्हणाली, बाप्तिस्मा करणारा योहान याचें शीर तबकांत येथें मला आणून द्या. ९ तेव्हां राजाला वाईट वाटलें; तरी आपल्या शपथांमुळें व जे पंक्तीस बसले होते त्यांच्यामुळें त्यानें तें द्यावयास आज्ञा केली; १० आणि माणूस पाठवून बंदिशाळेंत योहानाचा शिरच्छेद करविला. ११ मग त्याचें शीर तबकांत घालून मुलीला आणून दिलें, आणि तिनें तें आपल्या आईजवळ नेलें. १२ नंतर त्याच्या शिष्यांनीं येऊन त्याचें प्रेत उचलून नेलें व त्याला पुरलें; आणि जाऊन येशूला हें वर्तमान कळविलें.

### पांच हजारांना जेवूं घालणें

१३ येशू हें ऐकून तेथून निघून तारवांतून रानांत एकांतीं गेला; हें ऐकून लोकसमुदाय नगरांतून त्याच्या मागाहून पायींपायीं गेले. १४ मग त्यानें बाहेर येऊन मोठा लोकसमुदाय पाहिला; तेव्हां त्यांचा त्याला कळवळा आला व त्यांच्यांतील दुखणेकऱ्यांस त्यानें बरें केलें. १५ संध्याकाळ झाल्यावर त्याचे शिष्य त्याजकडे येऊन म्हणाले, ही जागा रान आहे, व वेळ होऊन गेली आहे; लोकसमुदायांनीं गांवांत जाऊन आपणांकरितां खावयास विकत घ्यावें म्हणून त्यांस निरोप द्या. १६ येशू त्यांस म्हणाला, त्यांस जाण्याची गरज नाहीं; तुम्ही त्यांस खावयास द्या.

१७ ते त्याला म्हणाले, आमच्याजवळ केवळ पांच भाकरी
व दोन मासे आहेत. १८ तो म्हणाला, तीं इकडे मज-
जवळ आणा. १९ मग त्यानें लोकसमुदायांस गवतावर
बसावयाला आज्ञा केली, आणि त्या पांच भाकरी व ते
दोन मासे घेऊन त्यानें वर आकाशाकडे पाहून आशीर्वाद
दिला; पुढें भाकरी मोडून शिष्यांस दिल्या व शिष्यांनीं
लोकसमुदायांस दिल्या. २० मग ते सर्व जेवून तृप्त झाले;
आणि त्यांनीं उरलेल्या तुकड्यांच्या बारा टोपल्या भरून
घेतल्या. २१ जेवणारे सुमारें पांच हजार पुरुष होते.
शिवाय स्त्रिया व मुलें निराळींच होतीं.

### येशू समुद्रावरून चालतो

२२ नंतर, मी लोकसमुदायांस निरोप देत आहें तों
तुम्ही तारवांत बसून माझ्यापुढें पलीकडे जा, असें म्हणून
त्यानें शिष्यांस लागलेंच लावून दिलें. २३ मग लोक-
समुदायांस निरोप दिल्यावर तो प्रार्थना करावयास डोंगरा-
वर एकांती गेला; आणि रात्र झाल्यावरहि तो तेथें एकटा
होता. २४ इकडे वारा तोंडचा असल्यामुळें तारूं लाटांनीं
हैराण झालेलें असें समुद्राच्या मध्यभागीं होतें. २५ तेव्हां
रात्रीच्या चवथ्या प्रहरीं तो समुद्रावरून चालत त्यांजकडे
आला. २६ शिष्य त्याला समुद्रावरून चालतां पाहून
घाबरे होऊन म्हणाले, भूत आहे; आणि ते भिऊन ओरडले;
२७ परंतु येशू त्यांस लागलाच म्हणाला, धीर धरा; मी
आहें; भिऊं नका. २८ तेव्हां पेत्रानें उत्तर दिलें, प्रभुजी,
आपण आहां तर पाण्यावरून आपल्याकडे यावयास मला
सांगा. २९ त्यानें म्हटलें, ये; तेव्हां पेत्र येशूकडे जावयास
तारवांतून उतरून पाण्यावरून चालूं लागला; ३० परंतु
वारा पाहून तो भ्याला, आणि बुडूं लागला असतां ओर-
डून बोलला, प्रभुजी, मला वांचवा. ३१ येशूनें तत्क्षणीं हात
पुढें करून त्याला धरिलें; व म्हटलें, अरे अल्पविश्वासी, तूं
संशय कां धरिलास ? ३२ मग ते तारवावर चढल्यावर
वारा पडला. ३३ तेव्हां जे तारवांत होते ते त्याच्या
पायां पडून म्हणाले, आपण खरोखर देवाचे पुत्र आहां.

३४ नंतर ते पैलतीरीं जाऊन गनेसरेतास पोहोंचले;
३५ आणि तेथल्या लोकांनीं त्याला ओळखून आपल्या
आसपासच्या अवघ्या प्रांतांत माणसें पाठवून सर्व दुखणा-
इतांस त्याजकडे आणिलें; ३६ आणि आपण केवळ
आपल्या वस्त्राच्या गोंड्यास आम्हांला स्पर्श करूं द्या, अशी
त्यांनीं त्याला विनंती केली; तेव्हां जितक्यांनीं स्पर्श केला
तितके बरे झाले.

### संप्रदायांच्या अनास्थेवरील टीकेस येशूचें उत्तर

१ मग यरुशलेमाहून परूशी व शास्त्री येशूकडे
१५ येऊन म्हणाले, २ आपले शिष्य वडिलांचा संप्रदाय
कां उल्लंघितात ? कारण भोजनसमयीं ते हात धूत
नाहींत. ३ त्यानें त्यांस उत्तर दिलें, तुम्हीहि आपल्या
संप्रदायेंकरून देवाची आज्ञा कां उल्लंघितां ? ४ कारण
देवानें असें म्हटलें कीं तूं 'आपल्या बापाचा व आईचा
सन्मान कर,' आणि 'जो बापाची किंवा आईची निंदा
करितो त्याला देहांत शिक्षा व्हावी;' ५ परंतु तुमचें म्हणणें
आहे कीं, जो कोणी बापाला अथवा आईला म्हणेल, मीं
तुला जें दिल्यानें तुझें हित मजकडून झालें असतें तें
अर्पण केलें आहे, ६ त्यानें आपल्या बापाचा अथवा
आईचा सन्मान न केला तरी चालेल. या प्रकारें तुम्हीं
आपल्या संप्रदायेंकरून देवाचें वचन रद्द केलें आहे. ७
अहो ढोंग्यांनो, तुम्हांविषयीं यशयानें संदेश यथायोग्य
दिला कीं,

८ हे लोक ओठांनीं माझा सन्मान करितात,
परंतु त्यांचें अंतःकरण मजपासून दूर आहे.
९ ते मनुष्यांचे नियम, शास्त्र म्हणून शिकवून माझी
निरर्थक भक्ति करितात.

१० तेव्हां त्यानें लोकसमुदायाला आपणाकडे बोलावून
म्हटलें, ऐका व समजून घ्या; ११ जें तोंडांत जातें तें
मनुष्याला विटाळवीत नाहीं; तर जें तोंडांतून निघतें तें
मनुष्याला विटाळवितें. १२ नंतर शिष्य येऊन त्याला
म्हणाले, हें वचन ऐकून परूशी रुसले, हें आपणाला कळलें
काय ? १३ त्यानें उत्तर दिलें कीं जो जो रोपा माझ्या
स्वर्गांतील पित्यानें लाविला नाहीं तो तो उपटला जाईल.
१४ त्यांस असूं द्या; ते आंधळे वाटाड्ये आहेत, आणि
आंधळा आंधळ्याला नेऊं लागला तर दोघेहि खाचेंत पड-
तील. १५ पेत्रानें त्याला उत्तर दिलें, हा दाखला आम्हांस

फोडून सांगा. १६ तो म्हणाला, अजून तुम्हीसुद्धां अज्ञान
आहां काय ? १७ जें कांहीं तोंडांत जातें तें पोटांत उतरतें
व बाहेर शौचकूपांत टाकण्यांत येतें, हें तुम्ही समजत
नाहीं काय ? १८ जें तोंडांतून निघतें तें अंतःकरणांतून
येतें व मनुष्याला विटाळवितें. १९ अंतःकरणांतून दुष्ट
कल्पना, खून, व्यभिचार, जारकर्में, चोऱ्या, खोट्या साक्षी,
शिव्यागाळी, हीं निघतात. २० मनुष्याला विटाळविणाऱ्या
गोष्टी ह्या आहेत; न धुतलेल्या हातांनीं जेवणें हें
मनुष्याला विटाळवीत नाहीं.

### यहुदीतर मुलीचें रोगनिवारण

२१ नंतर येशू तेथून निघून सोर व सीदोन यांच्या
प्रांतांत गेला; २२ आणि पाहा, त्या प्रांतांतून एक कनानी
बायको येऊन मोठ्यानें म्हणाली, प्रभो, दाविदाचे पुत्र,
मजवर दया करा. माझी कन्या भूतानें फार पीडलेली
आहे. २३ तरी त्यानें तिला कांहींच उत्तर दिलें नाहीं;
तेव्हां त्याच्या शिष्यांनीं जवळ येऊन त्याला विनंती केली
कीं तिला निरोप द्या; कारण ती आमच्यामागून ओरडत
येत आहे. २४ त्यानें उत्तर दिलें, इस्राएलाच्या घराण्यां-
तील हरवलेल्या मेंढरांखेरीज इतर कोणाकडे मला पाठवि-
लेलें नाहीं. २५ तेव्हां ती येऊन त्याच्या पायां पडून
म्हणाली, प्रभुजी, मला साह्य करा. २६ त्यानें उत्तर दिलें,
मुलांची भाकर घेऊन कुत्र्यांस घालणें हें ठीक नव्हे. २७
तिनें म्हटलें, खरें, प्रभु; तरी कुत्रींहि आपल्या धन्याच्या
मेजावरून पडलेला चूर खातात. २८ तेव्हां येशूनें तिला
उत्तर दिलें, बाई, तुझा विश्वास मोठा, तुझा मनोरथ
सिद्धीस जावो; आणि त्याच घटकेस तिची कन्या बरी झाली.

### पुष्कळ रोगी बरे होतात

२९ नंतर येशू तेथून निघून गालील समुद्राजवळ
आला, व डोंगरावर चढून तेथें बसला. ३० मग लोकांचे
थव्यांचे थवे त्याजकडे आले; त्यांच्याबरोबर लंगडे, अंधळे,
मुके, व्यंग व दुसरे बहुत जण होते; त्यांस त्यांनीं त्याच्या
पायांवर आणून घातलें आणि त्यानें त्यांस बरें केलें. ३१
मुके बोलतात, व्यंग धड होतात, लंगडे चालतात व अंधळे
पाहतात, हें लोकसमुदायांनीं पाहून आश्चर्य केलें आणि
इस्राएलाच्या देवाचें गौरव केलें.

### चार हजारांना जेवूं घालणें

३२ मग येशूनें आपल्या शिष्यांस बोलावून म्हटलें,
मला लोकांचा कळवळा येतो, कारण ते आज तीन दिवस
माझ्याजवळ आहेत आणि त्यांजजवळ खावयाला कांहीं
नाहीं; कदाचित् ते वाटेंत कासावीस होतील; म्हणून त्यांस
उपाशीं लावून द्यावें अशी माझी इच्छा नाहीं. ३३ शिष्य
त्याला म्हणाले, एवढा लोकसमुदाय तृप्त होईल इतक्या
भाकरी आम्हांजवळ रानांत कोठून असणार ? ३४ येशूनें
त्यांस विचारिलें, तुम्हांजवळ किती भाकरी आहेत ? ते
म्हणाले, सात, व कांहीं मासळ्या. ३५ मग त्यानें लोकसमु-
दायास जमिनीवर बसावयास सांगितलें. ३६ नंतर त्यानें त्या
सात भाकरी व मासळ्या घेऊन ईशोपकारस्मरण केलें; त्या
मोडून शिष्यांस दिल्या आणि शिष्यांनीं लोकसमुदायांला
दिल्या. ३७ मग ते सर्व जेवून तृप्त झाले आणि त्यांनीं
उरलेल्या तुकड्यांच्या सात पाट्या भरून घेतल्या. ३८
जेवणारे चार हजार पुरुष होते. शिवाय स्त्रिया व मुलें हीं
निराळींच होतीं. ३९ मग लोकसमुदायांस निरोप दिल्यावर
तो तारवांत बसून मगदानाच्या प्रांतांत आला.

### चिन्ह दाखविण्याबाबत केलेली विनंति व तीस येशूचा नकार

१६ १ तेव्हां परूशी व सदूकी यांनीं येऊन येशूची
परीक्षा पाहण्याकरितां, आम्हांस आकाशांतून कांहीं
चिन्ह दाखवावें, अशी त्याजकडे मागणी केली.
२ त्यानें त्यांस उत्तर दिलें, तुम्ही संध्याकाळीं म्हणतां,
उघाड होईल; कारण आभाळ तांबूस आहे; ३ आणि
तुम्ही सकाळीं म्हणतां, आज झड लागेल; कारण आभाळ
तांबूस व गढद आहे. तुम्हांला आभाळाचें स्वरूप ओळख-
ण्याचें समजतें, पण काळांचीं लक्षणें तुम्हांस ओळखतां
येत नाहींत. ४ दुष्ट व व्यभिचारी अशी पिढी चिन्ह मागते,
परंतु तिला योनाच्या चिन्हावांचून दुसरें चिन्ह मिळणार
नाहीं. मग तो त्यांस सोडून गेला.

### शिष्यांच्या असमंजसपणाचा निषेध

५ नंतर शिष्य पलीकडे गेले, पण भाकरी घ्यावयास
विसरले. ६ तेव्हां येशू त्यांस म्हणाला, परूशी व सदूकी
यांच्या खमिराविषयीं जपा व सावध राहा. ७ तेव्हां ते

आपसांत विचार करून म्हणाले, आम्हीं भाकरी घेतल्या
नाहींत म्हणून हा असें बोलतो; ८ परंतु येशू हें ओळखून
म्हणाला, अहो अल्पविश्वासी, आपल्याजवळ भाकरी
नाहींत म्हणून हा असें बोलतो, असा विचार तुम्ही मनांत
कां करितां? ९ तुम्ही अजून समजत नाहीं काय? पांच
हजारांला पांच भाकरी दिल्यावर तुम्हीं किती टोपल्या
उचलिल्या; १० तसेंच चार हजारांला सात भाकरी
दिल्यावर किती पाट्या उचलिल्या; याची तुम्हांला आठवण
नाहीं काय? ११ मीं भाकरीविषयीं बोललों नाहीं हें तुम्ही
कां समजत नाहीं? परूशी व सदूकी यांच्या खमिरा-
विषयीं सावध राहा. १२ तेव्हां ते समजले कीं त्यानें
भाकरीच्या खमिराविषयीं नाहीं, तर परूशी व सदूकी
यांच्या शिक्षणाविषयीं सावध राहण्यास सांगितलें.

### येशू हा ख्रिस्त असल्याची पेत्रानें दिलेली कबुली

१३ नंतर फिलिप्पाच्या कैसरीयाकडल्या प्रांतांत
गेल्यावर येशूनें आपल्या शिष्यांस विचारिलें, मनुष्याच्या
पुत्राला लोक कोण म्हणून म्हणतात? १४ ते बोलले,
कित्येक बाप्तिस्मा करणारा योहान, कित्येक एलीया, कित्येक
यिर्मया किंवा संदेष्ट्यांतील कोणीएक, असें म्हणतात. १५
तो त्यांस म्हणाला, पण तुम्ही मला कोण म्हणून म्हणतां?
१६ शिमोन पेत्रानें उत्तर दिलें, आपण ख्रिस्त, जीवंत
देवाचे पुत्र, आहां. १७ येशूनें त्याला म्हटलें, शिमोन
बार्योना, धन्य तुम्ही; कारण मांस व रक्त यांनीं नाहीं, तर
माझ्या स्वर्गांतील पित्यानें हें तुला प्रगट केलें आहे. १८
आणखी मी तुला सांगतों कीं तूं पेत्र आहेस; आणि या
खडकावर मी आपली मंडळी रचीन, व तिच्यापुढें अधो-
लोकाच्या द्वारांचें चालणार नाहीं. १९ मी तुला स्वर्गाच्या
राज्याच्या किल्ल्या देईन, आणि पृथ्वीवर जें कांहीं तूं बंद
करशील तें स्वर्गांत बंद केलें जाईल, आणि पृथ्वीवर जें
कांहीं तूं मोकळें करशील तें स्वर्गांत मोकळें केलें जाईल.
२० तेव्हां त्यानें शिष्यांस निक्षून सांगितलें, मी ख्रिस्त
आहें हें कोणाला सांगूं नका.

### स्वतःचें मरण व पुनरुत्थान यांविषयींचें येशूचें भविष्य

२१ तेव्हांपासून येशू आपल्या शिष्यांस दर्शवूं लागला
कीं मीं यरुशलेमास जाऊन वडील, मुख्य याजक व शास्त्री
यांच्या हातून बहुत दुःखें सोसावीं, जिवें मारिलें जावें व
तिसऱ्या दिवशीं उठावें, याचें अगत्य आहे. २२ तेव्हां
पेत्र त्याला जवळ घेऊन त्याचा निषेध करून म्हणाला,
प्रभुजी, आपणावर दया असो, असें आपणाला होणारच
नाहीं; २३ परंतु तो वळून पेत्राला म्हणाला, अरे सैताना,
माझ्यापुढून निघून जा; तूं मला अडखळा आहेस; कारण
देवाच्या गोष्टींकडे तुझें लक्ष नाहीं, माणसांच्या गोष्टींकडे
आहे.

### 'स्व' ला फांटा देण्याबद्दल इशारा

२४ मग येशूनें आपल्या शिष्यांस म्हटलें, माझ्या-
मागें येण्याचें कोणाच्या मनांत असेल तर त्यानें आत्म-
निग्रह करावा व आपला वधस्तंभ उचलून घेऊन मला
अनुसरावें. २५ कारण जो कोणी आपला जीव वांच-
विण्यास पाहील तो त्याला मुकेल; आणि जो कोणी
मजकरितां आपल्या जिवाला मुकेल त्याला तो मिळेल.
२६ मनुष्य सर्व जग मिळवील आणि आपला जीव
गमावील तर त्याला काय लाभ होईल? अथवा मनुष्य
आपल्या जिवाचा मोबदला काय देईल? २७ मनुष्याचा
पुत्र आपल्या पित्याच्या गौरवानें आपल्या दिव्यदूतांसहित
येईल, त्या समयीं 'तो प्रत्येकाला ज्याच्या त्याच्या कामा-
प्रमाणें फळ देईल.' २८ मी तुम्हांस खचीत सांगतों कीं
येथें उभें राहणाऱ्यांत कोणी असे आहेत कीं ते मनुष्याच्या
पुत्राला त्याच्या राज्यांत येतांना पाहत तोंपर्यंत त्यांस
मरणाचा अनुभव येणारच नाहीं;

### येशूचें रूपांतर

१ मग सहा दिवसांनंतर येशूनें पेत्र, याकोब
१७ व त्याचा भाऊ योहान यांस आपणाबरोबर एक
उंच डोंगरावर एकांतीं नेलें. २ तेव्हां त्याचें रूप
त्यांच्या देखतां पालटलें; त्याचें मुख सूर्यासारिखें तेजस्वी
झालें आणि त्याचीं वस्त्रें प्रकाशासारिखीं शुभ्र झालीं. ३ तेव्हां
पाहा, मोशे व एलीया हे त्याच्याबरोबर संभाषण करितांना
त्यांच्या दृष्टीस पडले. ४ मग पेत्र येशूला म्हणाला, प्रभुजी
आपण येथें असावें हें बरें आहे; आपली इच्छा असली
तर मी येथें तीन मंडप करितों; आपल्यासाठीं एक

मोशासाठीं एक व एलीयासाठीं एक. ५ तो बोलत आहे तों, पाहा, तेजस्वी मेघानें त्यांजवर छाया केली; आणि पाहा, मेघांतून अशी वाणी झाली: हा माझा पुत्र, मला परमप्रिय आहे, याजवर मी संतुष्ट आहें; याचें तुम्ही ऐका. ६ हें ऐकून शिष्य पालथे पडले व फार भयभीत झाले. ७ तेव्हां येशूनें जवळ येऊन त्यांस स्पर्श करून म्हटलें, उठा, भिऊं नका. ८ तेव्हां त्यांनीं डोळे वर करून पाहिलें तों येशूशिवाय कोणी त्यांच्या दृष्टीस पडला नाहीं.

९ नंतर ते डोंगरावरून खालीं येतांना येशूनें त्यांस आज्ञा केली कीं मनुष्याचा पुत्र मेलेल्यांतून उठेल तोंपर्यंत हा साक्षात्कार झाल्याचें कोणाला सांगूं नका. १० त्यावर त्याच्या शिष्यांनीं त्याला विचारिलें कीं, एलीया प्रथम आला पाहिजे असें शास्त्री कां म्हणतात? ११ येशूनें उत्तर दिलें, 'एलीया येऊन तो सर्व कांहीं 'यथास्थित' करील हें खरें; १२ परंतु मी तुम्हांस सांगतों कीं एलीया आलाच आहे, आणि त्यांनीं त्याला न ओळखतां मनास वाटलें तसें त्याला केलें; त्याप्रमाणें मनुष्याचा पुत्रहि त्यांचें सोसणार आहे. १३ तेव्हां बाप्तिस्मा करणारा योहान याजविषयीं हा आपणांस सांगतो, असें शिष्य समजले.

## भूतग्रस्त मुलाला बरें करणें

१४ नंतर ते लोकांजवळ आल्यावर एक मनुष्य त्याजकडे येऊन त्याजपुढें गुडघे टेकून म्हणाला, १५ प्रभुजी, माझ्या पुत्रावर दया करा, कारण तो फेपरेकरी असून फार दुःख भोगीत आहे; तो वारंवार विस्तवांत व वारंवार पाण्यांत पडतो. १६ मीं त्याला आपल्या शिष्यांकडे आणिलें, परंतु त्यांच्यानें त्याला बरें करवेना. १७ तेव्हां येशूनें उत्तर दिलें, अहाहा, विश्वासहीन व कुटिल पिढी, मी कोठवर तुम्हांबरोबर असूं? कोठवर तुमचें सोसूं? त्याला येथें माझ्याजवळ आणा. १८ नंतर येशूनें त्याला दटाविलें, तेव्हां त्याच्यांतून भूत निघून गेलें आणि त्याच घटकेस मुलगा बरा झाला.

१९ नंतर शिष्य एकांतीं येशूजवळ येऊन म्हणाले, आमच्यानें त्याला कां काढवलें नाहीं? २० त्यानें त्यांस म्हटलें, तुमच्या अल्पविश्वासामुळें; कारण मी तुम्हांस खचीत सांगतों की जर तुम्हांमध्यें मोहरीच्या दाण्याएवढा विश्वास असेल तर या डोंगराला येथून तिकडे सर, असें तुम्हीं म्हटल्यास तो सरेल; तुम्हाला कांहीं असाध्य होणार नाहीं. [ २१ तरी पण प्रार्थना व उपास यांवांचून अशल्या जातीचें भूत निघत नाहीं. ]

## आपल्या मृत्यूचें येशूनें दुसऱ्यांदा केलेलें भविष्य

२२ ते गालीलांत एकत्र झाले असतां येशू त्यांस म्हणाला, मनुष्याचा पुत्र लोकांच्या हातीं धरून दिला जाणार आहे; २३ ते त्याला जिवें मारितील, आणि तिसऱ्या दिवशीं तो उठेल. तेव्हां ते फार खिन्न झाले.

## तो मंदिराचा कर देतो

२४ नंतर ते कफर्णहूमांत आल्यावर पट्टीचा रुपया घेणारे पेत्राकडे येऊन म्हणाले, तुमचा गुरु पट्टीचा रुपया देत नाहीं काय? २५ त्यानें म्हटलें, हो, देतो. मग तो घरांत आल्यावर तो बोलण्याच्या अगोदर येशू म्हणाला, शिमोना, तुला कसें वाटतें? पृथ्वीवरील राजे कोणापासून जकात किंवा पट्टी घेतात? आपल्या पुत्रांपासून अथवा परक्यांपासून? २६ परक्यांपासून, असें त्यानें म्हटल्यावर येशूनें त्याला म्हटलें, तर पुत्र मोकळे आहेत. २७ तथापि आपण त्यांस अडखळवूं नये, म्हणून तूं जाऊन समुद्रांत गळ टाक; आणि पहिल्यानें वर येईल तो मासा धरून त्याचें तोंड उघड; म्हणजे तुला दोन रुपयांचें नाणें सांपडेल, तें घेऊन माझ्याबद्दल व तुझ्याबद्दल त्यांस दे.

## नम्रतेबाबत पाठ

१८ १ त्या वेळेस शिष्य येशूकडे येऊन म्हणाले, स्वर्गाच्या राज्यांत मोठा कोण? २ तेव्हां त्यानें एका बाळकाला बोलावून त्याला त्यांच्यामध्यें उभें केलें आणि म्हटलें, ३ मी तुम्हांस खचीत सांगतों, तुमचें मन वळल्याशिवाय व तुम्ही बाळकांसारखे झाल्याशिवाय स्वर्गाच्या राज्यांत तुमचा प्रवेश होणारच नाहीं. ४ यास्तव जो कोणी आपणाला या बाळकासारिखा लीन करील तोच स्वर्गाच्या राज्यांत मोठा होय; ५ आणि जो कोणी माझ्या नामानें अशा एका बाळकाला जवळ करील त्यानें मला जवळ केलें असें होईल.

## दुसऱ्यांना आडकाठी घालणाऱ्यांस इशारा

६ मजवर विश्वास ठेवणाऱ्या ह्या लहानांतील एकाला
जो कोणी अडखळवील त्याच्या गळ्यांत मोठ्या जात्याची
तळी बांधून त्याला समुद्राच्या खोल पाण्यांत बुडवावें
ह्यांत त्याचें हित आहे.

७ अडखळ्यांमुळें जगाला धिक्कार असो ! अडखळे तर
होणारच, परंतु ज्या मनुष्याकडून अडखळा होईल त्याला
धिक्कार असो ! ८ तुझा हात किंवा तुझा पाय तुला
अडखळवितो तर तो तोडून फेकून दे; दोन हात किंवा
दोन पाय असून सार्वकालिक अग्नींत पडावें यापेक्षां व्यंग
किंवा लंगडें होऊन जीवनांत जावें हें तुला बरें आहे.
९ तुझ्या डोळ्यानें तुला अडखळविलें तर तो उपटून फेकून
दे; दोन डोळे असून अग्निनरकांत पडावें यापेक्षां एक
डोळा असून जीवनांत जावें हें तुला बरें आहे. १०
संभाळा, या लहान मुलांतील एकालाहि तुच्छ मानूं नका;
कारण, मी तुम्हांस सांगतों कीं स्वर्गांत त्यांचे दिव्यदूत
माझ्या स्वर्गांतील पित्याचें तोंड नित्य पाहतात. [ ११
आणखी जें हरवलेलें त्याला तारावयास मनुष्याचा पुत्र
आला आहे. ]

## हरवलेल्या मेंढराचा दृष्टांत

१२ तुम्हांस कसें वाटतें: कोणाएका मनुष्याजवळ
शंभर मेंढरें आहेत, आणि त्यांतून एखादें भटकलें तर
तो तीं नव्याण्णव डोंगरावर सोडून त्या भटकलेल्याचा
शोध करण्यास जाणार नाहीं काय? १३ कदाचित् तें
त्याला सांपडलें, तर न भटकलेल्या नव्याण्णवांपेक्षां तो
त्यावरून अधिक आनंद करील असें मी तुम्हांस खचीत
सांगतों. १४ तसें या लहानांतील कोणाचाहि नाश व्हावा
अशी तुमच्या स्वर्गांतील पित्याची इच्छा नाहीं.

## अपराध करणाऱ्यांबरोबर कशी वागणूक करावी

१५ तुझ्या भावानें तुझा अपराध केला, तर जा, आणि
तूं व तो एकटे असतांना त्याचा अपराध त्याला दाखीव;
त्यानें तुझें ऐकलें तर तूं आपला भाऊ मिळविला असें
होईल; १६ परंतु त्यानें जर न ऐकलें तर तूं आणखी
एकदोघांस आपणाबरोबर घे; अशासाठीं कीं दोन किंवा
तीन साक्षीदारांच्या तोंडानें प्रत्येक शब्द शाबीत व्हावा;
१७ आणि जर त्यानें त्यांचें न ऐकलें तर मंडळीला कळीव;
आणि त्यानें मंडळीचेंहि न ऐकलें तर तो तुला विदेशी
किंवा जकातदार याच्यासारिखा होवो. १८ मी तुम्हांस
खचीत सांगतों, जें कांहीं तुम्ही पृथ्वीवर बंद कराल, तें
स्वर्गांत बंद केलें जाईल; आणि जें कांहीं तुम्ही पृथ्वीवर
मोकळें कराल, तें स्वर्गांत मोकळें केलें जाईल.

## संयुक्त प्रार्थना

१९ आणखी तुम्हांस सांगतों, पृथ्वीवर तुमच्यांतील
दोघे कोणाएका गोष्टीविषयीं एकचित्त होऊन विनंति करि-
तील तर ती माझ्या स्वर्गांतील पित्याकडून त्यासाठीं केली
जाईल; २० कारण जेथें दोघे किंवा तिघे माझ्या नामानें
जमले आहेत तेथें त्यांजमध्यें मी आहें.

## एकमेकांला क्षमा करणें या कर्तव्याची शिकवण व त्याबाबत कृतघ्न चाकराचा दृष्टांत

२१ तेव्हां पेत्र त्याजकडे येऊन म्हणाला, प्रभुजी,
माझ्या भावानें किती वेळां माझा अपराध केला असतां
मी त्याला क्षमा करूं; सात वेळां काय? २२ येशूनें त्याला
म्हटलें, सात वेळां असें मी तुला म्हणत नाहीं, तर
सातांच्या सत्तर वेळां. २३ यामुळें स्वर्गाचें राज्य कोणाएका
राजासारखें आहे; त्या राजाला आपल्या दासांपासून हिशेब
घ्यावा असें वाटलें; २४ आणि तो हिशेब घेऊं लागला
तेव्हां एक कोटि रुपयांच्या देणेदाराला त्याजकडे आणिलें.
२५ त्याजवळ फेड करावयास कांहीं नसल्यामुळें त्याच्या
धन्यानें हुकूम केला कीं तो, त्याची बायको व मुलें यांस
व त्याचें जें कांहीं असेल तें विकून फेड करून घ्यावी.
२६ तेव्हां त्या दासानें त्याच्या पायां पडून म्हटलें, मला
वागवून घ्या, म्हणजे मी आपली सर्व फेड करीन. २७
तेव्हां त्या दासाच्या धन्याला दया येऊन त्यानें त्याला
मोकळें केलें, व त्याचें तें देणें सोडिलें. २८ तोच दास
बाहेर गेल्यावर ज्याच्याकडे त्याचें पंचवीस रुपये येणें होतें
असा त्याचा एक सोबतीचा दास त्याला आढळला, तेव्हां
तो त्याला धरून त्याची नरडी आवळून म्हणाला, तुजकडे
माझें येणें आहे तें फेडून टाक. २९ यावर त्याचा सोब-
तीचा दास त्याच्या पायां पडून गयावयां करून म्हणाला,

मला वागवून घे, म्हणजे मी तुझी फेड करीन; ३० पण
त्याचें न ऐकतां त्यानें जाऊन तें देणें तो फेडीपर्यंत त्याला
बंदिशाळेंत घालून ठेविलें. ३१ तेव्हां घडलेला हा प्रकार
पाहून त्याच्या सोबतीचे दास फार दुःखी झाले, आणि
त्यांनीं येऊन सर्व वर्तमान आपल्या धन्याला स्पष्ट सांगितलें.
३२ तेव्हां त्याच्या धन्यानें त्याला बोलावून म्हटलें, अरे
दुष्ट दासा, तूं मला विनवणी केल्यावरून मीं तें सर्व देणें
तुला सोडिलें; ३३ जशी दया मीं तुजवर केली तशी दया
तूंहि आपल्या सोबतीच्या दासावर करावयाची नव्हती काय?
३४ मग त्याच्या धन्यानें त्याजवर रुष्ट होऊन तो सर्व देणें
फेडीपर्यंत त्याला यातना करणाऱ्यांच्या हातीं दिलें. ३५
जर तुम्ही प्रत्येक आपापल्या बंधूला मनापासून क्षमा
करणार नाहीं, तर माझा स्वर्गांतील पिताहि त्याप्रमाणेंच
तुम्हांविषयीं करील.

## सूटपत्र ( सोडचिठ्ठी ) विषयक प्रश्न

१ नंतर असें झालें कीं हे बोलणें समाप्त
१९ केल्यावर येशू गालीलाहून निघून यार्देनेच्या पली-
कडे यहूदीया प्रांतांत गेला. २ तेव्हां लोकांचे
थव्यांचे थवे त्याच्यामागून गेले; त्यांस त्यानें तेथें बरें केलें.
३ नंतर परूशी त्याजकडे येऊन त्याची परीक्षा
पाहण्याकरितां म्हणाले, बायकोला कोणत्याहि कारणावरून
टाकणें हें योग्य काय? ४ त्यानें उत्तर दिलें, हें तुमच्या
वाचण्यांत आलें नाहीं काय कीं ज्यानें मनुष्यें उत्पन्न
केलीं, त्यानें ‘तीं’ प्रारंभापासून ‘नरनारी अशीं उत्पन्न
केलीं,’ ५ व म्हटलें, ‘याकरितां पुरुष आईबापांस सोडून
आपल्या बायकोला जडून राहील, आणि तीं दोघें एकदेह
होतील’? ६ यामुळें तीं पुढें दोन नव्हत तर एकदेह
अशीं आहेत. यास्तव देवानें जें जोडिलें आहे तें मनुष्यानें
तोडूं नये. ७ ते त्याला म्हणाले, तर ‘सूटपत्र देऊन तिला
टाकावें’ अशी आज्ञा मोशानें कां दिली? ८ त्यानें त्यांस
म्हटलें, तुमच्या अंतःकरणाच्या कठोरपणामुळें मोशानें
तुम्हांस आपल्या बायका टाकूं दिल्या; तरी प्रारंभापासून
असें नव्हतें. ९ मी तुम्हांस सांगतों कीं, जो कोणी
आपल्या बायकोला व्यभिचाराच्या कारणावांचून टाकून
दुसरी करितो तो व्यभिचार करितो; आणि जो कोणी
अशा टाकिलेल्या स्त्रीबरोबर लग्न करितो तोहि व्यभिचार
करितो. १० शिष्य त्याला म्हणाले, बायकोच्या संबंधानें
पुरुषाची गोष्ट अशी असली तर लग्नच न केलेलें बरें. ११
त्यानें त्यांस म्हटलें, हें वचन सर्वांच्यानें स्वीकारवत नाहीं;
ज्यांस हें दान दिलें आहे ते स्वीकारितात. १२ कारण
आईच्या उदरापासून जन्मलेले असे नपुंसक आहेत,
मनुष्यांनीं केलेले असेहि नपुंसक आहेत, आणि स्वर्गाच्या
राज्यासाठीं ज्यांनीं आपणांस नपुंसक करून घेतलें असे
नपुंसक आहेत. ज्याच्यानें हें स्वीकारवतें तो स्वीकारो.

## येशू लहान मुलांना आशीर्वाद देतो

१३ नंतर त्यानें बाळकांवर हात ठेवून प्रार्थना करावी
म्हणून त्याच्याजवळ त्यांस आणिलें; परंतु शिष्यांनीं आण-
णाऱ्यांस दटाविलें. १४ येशूनें म्हटलें, बाळकांस मजकडे
येऊं द्या, त्यांस मना करूं नका, कारण स्वर्गाचें राज्य
असल्यांचेंच आहे. १५ मग त्यांजवर हात ठेविल्यावर तो
तेथून गेला.

## सार्वकालिक जीवनप्राप्त्यर्थ काय करावें असा श्रीमंत तरुणाचा प्रश्न

१६ नंतर, पाहा, एक जण येऊन त्याला म्हणाला, गुरुजी,
मला सार्वकालिक जीवन मिळावें म्हणून मीं कोणतें चांगलें कार्य
करावें? १७ त्यानें त्याला म्हटलें, मला चांगल्याविषयीं कां
विचारितोस? चांगला असा एकच आहे; तरी तूं जीवनांत
प्रवेश करूं पाहतोस तर देवाच्या आज्ञा पाळ. १८ तो
त्याला म्हणाला, कोणत्या? येशूनें म्हटलें, ‘मनुष्यहत्या
करूं नको, व्यभिचार करूं नको, चोरी करूं नको, खोटी
साक्ष देऊं नको, १९ आपल्या बापाचा व आपल्या
आईचा सन्मान कर,’ आणि ‘जशी आपणावर तशी
आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर.’ २० तो तरुण त्याला
म्हणाला, मीं हें अवघें पाळिलें आहे; माझ्या ठायीं अजून
काय उणें आहे? २१ येशूनें त्याला म्हटलें, पूर्ण होऊं पाह-
तोस तर जा, आपली मालमत्ता विकून दरिद्र्यांस दे,
म्हणजे तुला स्वर्गांत संपत्ति मिळेल; आणि चल, माझ्यामागें
ये; २२ पण ही गोष्ट ऐकून तो तरुण खिन्न होऊन निघून
गेला, कारण त्याची मालमत्ता पुष्कळशी होती.

### द्रव्यलोभापासून पारमार्थिक तोटे

२३ तेव्हां येशूनें आपल्या शिष्यांस म्हटलें, मी तुम्हांस
खचीत सांगतों, स्वर्गाच्या राज्यांत धनवानाचा प्रवेश होणें
कठीण आहे. २४ आणखी तुम्हांस सांगतों, देवाच्या
राज्यांत धनवानाचा प्रवेश होणें यापेक्षां उंटाला सुईच्या
नेढ्यांतून जाणें सोपें आहे. २५ हें ऐकून शिष्य फार थक
होऊन म्हणाले, तर मग कोण तरेल? २६ येशूनें त्यांज-
कडे न्याहाळून पाहून म्हटलें, हें मनुष्याला अशक्य आहे,
देवाला तर सर्व शक्य आहे. २७ तेव्हां पेत्रानें त्याला
म्हटलें, पाहा, आम्ही सर्व सोडून आपल्यामागें आलों
आहों, तर आम्हांस काय मिळणार आहे? २८ येशूनें
त्यांस म्हटलें, मी तुम्हांस खचीत सांगतों, पुनरुत्पत्तींत
मनुष्याचा पुत्र आपल्या गौरवाच्या राजासनावर बसेल, तेव्हां
माझ्यामागें चालत आलेले तुम्हीहि बारा राजासनांवर बसून
इस्राएलाच्या बारा वंशांचा न्यायनिवाडा कराल. २९
आणखी ज्या कोणी घरें, भाऊ, बहिणी, बाप, आई, मुलें
किंवा शेतें माझ्या नामाकरितां सोडिलीं आहेत, त्याला
शंभरपट मिळून सार्वकालिक जीवन हें वतन मिळेल, ३०
परंतु जे पहिले ते शेवटले आणि शेवटले ते पहिले, असें
पुष्कळ जणांचें होईल.

### द्राक्षमळ्यांतील कामकऱ्यांचा दृष्टांत

**२०** १ स्वर्गाचें राज्य कोणाएका घरधन्यासारखें
आहे; तो आपल्या द्राक्षमळ्यांत मोलानें कामकरी
लावावयास मोठ्या सकाळीं बाहेर गेला; २ आणि
त्यानें कामकऱ्यांस रोजची पावली ठरवून त्यांस आपल्या
द्राक्षमळ्यांत पाठविलें. ३ मग तो तिसऱ्या तासाच्या सुमा-
रास बाहेर गेला आणि त्यानें अड्ड्यावर कित्येकांस रिकामें
उभें राहिलेलें पाहिलें. ४ तो त्यांस म्हणाला, तुम्हीहि द्राक्ष-
मळ्यांत जा, जें योग्य तें मी तुम्हांस देईन; आणि ते गेले.
५ पुनः सहाव्या व नवव्या तासाच्या सुमारास त्यानें बाहेर
जाऊन तसेंच केलें. ६ नंतर अकराव्या तासाच्या सुमारास
तो बाहेर गेला तेव्हां आणखी कित्येक उभे राहिलेले त्याला
आढळले; त्यांस त्यानें म्हटलें, तुम्ही सारा दिवस येथें
रिकामे कां उभे राहिलां आहां? ७ ते त्याला म्हणाले,
आम्हांस कोणीं कामावर लाविलें नाहीं म्हणून. त्यानें त्यांस
म्हटलें, तुम्हीहि द्राक्षमळ्यांत जा. ८ मग संध्याकाळ झाल्या-
वर द्राक्षमळ्याचा धनी आपल्या कारभाऱ्याला म्हणाला,
कामकऱ्यांस बोलाव, आणि शेवटल्यापासून आरंभ करून
पहिल्यापर्यंत त्यांस मजुरी दे. ९ तेव्हां जे अकराव्या तासाच्या
सुमारास लाविले होते ते आल्यावर त्यांस पावली पावली
मिळाली; १० मग पहिले आले, आणि आपणांस अधिक
मिळेल असें त्यांना वाटलें तरी त्यांसहि पावली पावलीच
मिळाली. ११ ती त्यांनीं घेतल्यावर घरधन्याविरुद्ध कुरकूर
करून म्हटलें, १२ या शेवटल्यांनीं एकच तास काम केलें,
आणि आम्हीं दिवसभर उन्हातान्हांत कष्ट केले, त्या
आम्हांस व त्यांस तुम्हीं सारखें लेखिलें आहे. १३ तेव्हां
त्यानें त्यांतील एकाला उत्तर दिलें, गड्या, मी तुझा अन्याय
करीत नाहीं; तूं मजबरोबर पावलीचा करार केला कीं
नाहीं? १४ तूं आपलें घेऊन चालावयाला लाग; जसें तुला
तसें या शेवटल्यालाहि द्यावें अशी माझी इच्छा आहे. १५
जें माझें आहे त्याचें आपल्या मर्जीप्रमाणें करावयास मी
मुखत्यार नाहीं काय? अगर मी उदार आहें हें तुझ्या
डोळ्यांत सलतें काय? १६ याप्रमाणें शेवटले ते पहिले
व पहिले ते शेवटले होतील.

### येशूनें आपल्या मृत्यूचें तिसऱ्यांदा केलेलें भविष्य

१७ येशू वर यरुशलेमास जात असतां त्यानें बारा
शिष्यांस वाटेंत एकीकडे नेऊन म्हटलें, १८ पाहा, आपण
वर यरुशलेमास जात आहों आणि मनुष्याच्या पुत्राला
मुख्य याजकांच्या व शास्त्र्यांच्या हातीं धरून देण्यांत
येईल; ते त्याला मरणदंड ठरवितील; १९ थट्टा करावयास,
फटके मारावयास व वधस्तंभावर खिळावयास त्याला
विदेश्यांच्या स्वाधीन करितील आणि तिसऱ्या दिवशीं तो
पुनः उठेल.

### ऐहिक सन्मानप्राप्त्यर्थ विनंति

२० तेव्हां जब्दीच्या पुत्रांच्या आईनें आपल्या पुत्रांसह
त्यांजकडे येऊन पायां पडून त्यांजजवळ कांहीं मागितलें.
२१ त्यानें तिला म्हटलें, तुला काय पाहिजे? ती त्याला
म्हणाली, आपल्या राज्यांत या माझ्या दोघां पुत्रांतील
एकानें आपल्या उजवीकडे व एकानें आपल्या डावीकडे

बसावें अशी आज्ञा द्या. २२ येशूनें उत्तर दिलें कीं तुम्ही काय
मागतां हें तुम्हांस समजत नाहीं; जो प्याला मी पिणार
आहें तो तुमच्यानें पिववेल काय? ते त्याला म्हणाले,
पिववेल. २३ त्यानें त्यांस म्हटलें, माझा प्याला तुम्ही प्याल
खरा, पण माझ्या उजवीकडे व माझ्या डावीकडे बसण्याचा
अधिकार देणें मजकडे नाहीं, तर ज्यांच्यासाठीं माझ्या
पित्यानें हा सिद्ध केला त्यांच्यासाठीं तो आहे. २४ ही
गोष्ट ऐकून दहा शिष्यांस त्या दोघां भावांचा राग आला.

### खरें मोठेपण

२५ पण येशूनें त्यांस बोलावून म्हटलें, विदेश्यांवर
त्यांचे अधिपति प्रभुत्व चालवितात व मोठे लोकहि अधि-
कार करितात, हें तुम्हांस ठाऊक आहे. २६ तुम्हांमध्यें
तसें नसावें; तर तुम्हांमध्यें जो कोणी श्रेष्ठ होऊं पाहतो
त्यानें तुमचा सेवक व्हावें; २७ आणि तुम्हांमध्यें जो
कोणी पहिला होण्यास इच्छितो त्यानें तुमचा दास व्हावें;
२८ याप्रमाणें मनुष्याचा पुत्र सेवा करून घ्यावयास नाहीं,
तर सेवा करावयास व बहुतांच्या खंडणीसाठीं आपला जीव
द्यावयास आला.

### दोन अंधळ्यांला दृष्टिदान

२९ मग ते यरीहोहून जात असतां मोठा लोकसमुदाय
त्याच्यामागून चालला. ३० तेव्हां पाहा, वाटेवर बसलेले
दोन अंधळे, येशू जवळून जात आहे हें ऐकून, ओरडून
म्हणाले, प्रभो, अहो दाविदाचे पुत्र, आम्हांवर दया करा.
३१ त्यांनीं उगें राहावें म्हणून लोकांनीं त्यांस धमकाविलें;
तरी ते अधिकच ओरडून म्हणाले, प्रभो, अहो दाविदाचे
पुत्र, आम्हांवर दया करा. ३२ येशूनें उभें राहून त्यांस
बोलावून म्हटलें, मीं तुम्हांसाठीं काय करावें म्हणून तुमची
इच्छा आहे? ३३ ते त्याला म्हणाले, प्रभुजी, आमचे
डोळे उघडावे. ३४ तेव्हां येशूला कळवळा येऊन त्यानें
त्यांच्या डोळ्यांस स्पर्श केला, तेव्हां त्यांस तत्काळ दिसूं
लागलें, आणि ते त्याच्यामागें चालले.

### यरुशलेमांत येशूचा जयोत्सवानें प्रवेश

२१ १ ते यरुशलेमाजवळ येत असतां जैतूनांच्या
डोंगराजवळ बेथफगे येथवर पोंहचले, तेव्हां
येशूनें दोघां शिष्यांना असें सांगून पाठविलें कीं
२ तुम्ही समोरच्या गांवांत जा, म्हणजे तेथें बांधून
ठेविलेली एक गाढवी व तिच्याजवळ शिंगरूं अशीं तुम्हांस
लागलींच आढळतील; त्यांस सोडून मजकडे आणा; ३
आणि कोणीं तुम्हांस कांहीं म्हटलें, तर प्रभूला यांची गरज
आहे, असें सांगा म्हणजे तो तेव्हांच तीं पाठवील. ४ संदे-
ष्ट्याच्या द्वारें जें सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें म्हणून हें
झालें; तें असें कीं,

५ सीयोनेच्या कन्येला सांगा,
पाहा, तुझा राजा तुजकडे येत आहे; तो सौम्य आहे
म्हणून तो गाढवावर, म्हणजे गाढवीच्या शिंगरावर
बसला आहे.

६ तेव्हां शिष्यांनीं जाऊन येशूच्या आज्ञेप्रमाणें केलें; ७
गाढवी व शिंगरूं हीं आणून त्यांवर आपलीं वस्त्रें घातलीं
व तो वर बसला. ८ तेव्हां लोकसमुदायांतील बहुतेकांनीं
आपलीं वस्त्रें वाटेवर पसरलीं व कांहींनीं झाडांच्या डहाळ्या
तोडून वाटेवर पसरिल्या; ९ आणि पुढें चालणारे व मागें
चालणारे लोक गजर करीत म्हणाले, दाविदाच्या पुत्राला
'होसान्ना; प्रभूच्या नामानें येणारा धन्यवादित असो,' उर्ध्व-
लोकीं 'होसान्ना.' १० तो यरुशलेमांत आल्यावर सर्व
नगर गजबजून म्हणालें, हा कोण? ११ लोकसमुदाय
म्हणाले, गालीलांतील नासरेथाहून आलेला हा येशू
संदेष्टा होय.

### तो मंदिराचें शुद्धीकरण करतो

१२ नंतर येशू मंदिरांत गेला; मंदिरांत जे क्रयविक्रय
करीत होते त्या सर्वांस त्यानें बाहेर घालवून दिलें,
सराफांचे चौरंग व कबुतरें विकणाऱ्यांच्या बैठकी पालथ्या
केल्या, १३ आणि त्यांस म्हटलें, 'माझ्या घरास
प्रार्थनामंदिर म्हणतील,' असें लिहिलें आहे; परंतु तुम्ही
तें 'लुटारूंची गुहा' करीत आहां. १४ मग अंधळे व
लंगडे त्याजकडे मंदिरांत आले, त्यांस त्यानें बरें केलें.
१५ तेव्हां त्यानें केलेले चमत्कार व दाविदाच्या पुत्राला
'होसान्ना' असें मंदिरांत गजर करणारीं मुलें हीं पाहून
मुख्य याजक व शास्त्री रागावले, १६ व त्याला
म्हणाले हीं काय म्हणतात हें तुम्ही ऐकतां काय?
येशूनें त्यांस म्हटलें, हो; 'बाळकें व तान्हीं मुलें यांच्या

मुखांतून तूं स्तुति पूर्ण करविली ' आहे, हें तुमच्या वाच-
ण्यांत कधीं आलें नाहीं काय ? १७ नंतर तो त्यांस सोडून
नगराबाहेर बेथानीस गेला, व तेथें वस्तीस राहिला.

### निष्फळ अंजिराचें झाड

१८ मग सकाळीं तो परत नगरास येत असतां त्याला
भूक लागली; १९ आणि वाटेवर अंजिराचें एक झाड
पाहून तो त्याकडे गेला; पण पानांवांचून त्यावर त्याला
कांहीं मिळालें नाहीं; मग त्यानें त्यास म्हटलें, यापुढें तुला
फळ कधीं न येवो; आणि तें अंजिराचें झाड लागलेंच
वाळून गेलें. २० हें पाहून शिष्यांनीं आश्चर्य करून म्हटलें,
अंजिराचें झाड लागलेंच कसें वाळून गेलें ? २१ येशूनें त्यांस
उत्तर दिलें, मी तुम्हांस खचीत सांगतों, तुम्हांस विश्वास
असला व तुम्हीं संशय न धरिला, तर अंजिराच्या
झाडाला केल्याप्रमाणें तुम्ही कराल, इतकेंच नाहीं, तर या
डोंगरालाहि तूं उपटून समुद्रांत टाकिला जा, असें जर
म्हणाल तर तें घडेल. २२ तुम्ही विश्वास धरून प्रार्थनेंत
जें कांहीं मागाल तें सर्व तुम्हांस मिळेल.

### येशूच्या अधिकाराविषयींचा प्रश्न

२३ नंतर तो मंदिरांत जाऊन शिक्षण देत असतां
मुख्य याजक व लोकांचे वडील जन त्याच्याजवळ येऊन
म्हणाले, तुम्ही कोणत्या अधिकारानें हें करतां, व तुम्हांला हा
अधिकार कोणीं दिला ? २४ येशूनें त्यांस उत्तर दिलें,
मीहि तुम्हांस एक गोष्ट विचारितों ती मला सांगाल तर
कोणत्या अधिकारानें मी हें करितों, तें मीहि तुम्हांस
सांगेन. २५ योहानाचा बाप्तिस्मा कोठून होता ?
स्वर्गांतून किंवा मनुष्यांतून ? तेव्हां ते आपसांत
विचार करूं लागले कीं स्वर्गांतून असें म्हणावें तर हा
आपल्याला म्हणेल, मग तुम्हीं त्याजवर कां विश्वास ठेविला
नाहीं ? २६ बरें, मनुष्यांतून असें म्हणावें तर आपल्याला
लोकांची भीति वाटते, कारण सर्व लोक योहानाला संदेष्टा
मानितात. २७ तेव्हां त्यांनीं येशूला उत्तर दिलें, आम्हांस
ठाऊक नाहीं. तो त्यांस म्हणाला, तर कोणत्या अधिकारानें
हें करितों हें मीहि तुम्हांस सांगत नाहीं.

### दोन पुत्रांचा दृष्टांत

२८ तुम्हांस काय वाटतें तें सांगा बरें ? एका
मनुष्याला दोन पुत्र होते; तो पहिल्याकडे जाऊन म्हणाला,
मुला, आज द्राक्षमळ्यांत जाऊन काम कर; २९ त्यानें उत्तर
दिलें, मी नाहीं जात; तरी कांहीं वेळानें त्याला पस्तावा
होऊन तो गेला. ३० मग दुसऱ्याकडे जाऊन त्यानें तसेंच
म्हटलें; त्यानें उत्तर दिलें, जातों महाराज; पण गेला नाहीं.
३१ या दोघांतून कोणी बापाच्या इच्छेप्रमाणें केलें ? ते
म्हणाले, पहिल्यानें. येशूनें त्यांस म्हटलें, मी तुम्हांस
खचीत सांगतों कीं जकातदार व कसबिणी तुमच्यापुढें
देवाच्या राज्यांत जातात. ३२ कारण योहान धर्ममार्गानें
तुम्हांकडे आला, आणि तुम्हीं त्याचा विश्वास धरिला नाहीं;
जकातदार व कसबिणी यांनीं त्याचा विश्वास धरिला; तर
हें पाहून तुम्हीं त्याचा विश्वास धरावा असा मागूनहि
पश्चात्ताप केला नाहीं.

### द्राक्षमळ्याचा दृष्टांत

३३ आणखी एक दाखला ऐकून घ्या; कोणीएक
गृहस्थ होता, 'त्यानें द्राक्षमळा लाविला, त्याभोंवतें कुंपण
घातलें, त्यामध्यें द्राक्षारसासाठीं कुंड खणिलें व माळा
बांधिला;' आणि तो माळ्यांस सोपून देऊन आपण परदेशीं
गेला. ३४ नंतर फळांचा हंगाम आल्यावर त्यानें आपलें
उत्पन्न घेण्याकरितां आपल्या दासांस माळ्यांकडे पाठविलें.
३५ तेव्हां माळ्यांनीं त्याच्या दासांस धरून कोणाला ठोक
दिला, कोणाला जिवें मारिलें, व कोणाला दगडमार केला.
३६ त्यानें फिरून पहिल्यापेक्षां अधिक असे दुसरे दास
पाठविले; त्यांच्याशींहि ते तसेंच वागले. ३७ शेवटीं, ते
आपल्या पुत्राचा मान राखतील असें म्हणून त्यानें आपल्या
पुत्रास त्यांजकडे पाठविलें; ३८ परंतु माळी पुत्राला पाहून
आपसांत म्हणाले, हा वारीस आहे; चला आपण याला
जिवें मारूं, व याचें वतन घेऊं. ३९ तेव्हां त्यांनीं त्याला
धरून द्राक्षमळ्याबाहेर काढून जिवें मारिलें. ४० तर मग
द्राक्षमळ्याचा धनी येईल तेव्हां तो त्या माळ्यांचें काय
करील ? ४१ ते त्याला म्हणाले, तो त्या दुष्टांचे हालहाल
करून त्यांचा नाश करील, आणि जे माळी हंगामीं त्याला
उत्पन्न देतील अशा दुसऱ्यांकडे तो द्राक्षमळा सोपून देईल.
४२ येशू त्यांस म्हणाला,

जो धोंडा बांधणाऱ्यांनीं नापसंत केला,

कोनशिला झाला;
हें प्रभूकडून झालें,
आणि हें आमच्या दृष्टीनें आश्चर्यकारक कृत्य आहे,
असें शास्त्रांत तुमच्या वाचण्यांत कधीं आलें नाहीं काय ?
४३ यास्तव मी तुम्हांस सांगतों कीं देवाचें राज्य तुम्हां-
पासून काढून घेतलें जाईल; व जी प्रजा त्याचें उत्पन्न देईल
तिला तें दिलें जाईल. ४४ जो ह्या धोंड्यावर पडेल त्याचा
चुराडा होईल, परंतु ज्या कोणावर हा पडेल, त्याचा हा
भुगाभुगा करून टाकील. ४५ मुख्य याजक व परूशी त्याचे
दाखले ऐकून, हा आम्हांविषयीं बोलत आहे, असें समजले.
४६ ते त्याला धरावयास पाहत होते, परंतु त्यांना लोक-
समुदायांची भीति वाटली; कारण ते त्याला संदेष्टा
मानीत होते.

## लग्नाच्या मेजवानीचा दृष्टांत

२२ १ येशू पुनः त्यांस दाखले देऊन बोलूं लागला :
२ स्वर्गाचें राज्य कोणाएका राजासारिखें आहे;
त्यानें आपल्या पुत्राच्या लग्नाची मेजवानी केली;
३ आणि लग्नाच्या मेजवानीस ज्यांस आमंत्रण दिलें होतें
त्यांस बोलावण्याकरितां त्यानें आपले दास पाठविले, परंतु
ते येईनात. ४ पुनः त्यानें दुसरे दास पाठविले, व त्यांस
म्हटलें कीं आमंत्रितांस असें सांगा; पाहा, मीं जेवण
तयार केलें आहे, आपले बैल व पुष्ट पशु कापिले आहेत,
सर्व सिद्ध आहे, लग्नाच्या मेजवानीस चला. ५ तरी हें
कांहीं मनावर न घेतां ते कोणी आपल्या शेताला, कोणी
आपल्या व्यापाराला गेले; ६ आणि वरकडांनीं त्याच्या
दासांस धरून गांजिलें व जिवें मारिलें. ७ तेव्हां राजाला
राग आला; आणि त्यानें आपलीं सैन्यें पाठवून त्या घात-
क्यांचा नाश केला, व त्यांचें नगर जाळून टाकिलें. ८ मग
तो आपल्या दासांस म्हणाला, लग्नाची तयारी आहे खरी,
परंतु आमंत्रित योग्य नव्हते, ९ म्हणून तुम्ही चवाठ्यांवर
जाऊन जितके तुम्हांस आढळतील तितक्यांस लग्नाच्या
मेजवानीस बोलावा. १० मग त्या दासांनीं रस्त्यांवर
जाऊन बरेवाईट जितके त्यांस मिळाले त्या सर्वांस एकत्र
केलें; आणि लग्नाच्या जेवणाऱ्यांची भरती झाली. ११
राजा जेवणाऱ्यांना पाहावयास आंत आला, तेव्हां लग्नाचा
पोशाक न घातलेला असा एक मनुष्य त्याच्या दृष्टीस
पडला. १२ त्याला तो म्हणाला, मित्रा, तूं लग्नाचा पोशाक
घातल्यावांचून येथें कां आलास ? त्यानें कांहीं उत्तर दिलें
नाहीं. १३ मग राजानें चाकरांस सांगितलें, याचे हातपाय
बांधून याला बाहेरील अंधारांत टाका, तेथें रडणें व दांत
खाणें चालेल. १४ बोलावलेले बहुत आहेत, पण निवड-
लेले थोडके आहेत.

## कर देण्याविषयींचा प्रश्न

१५ नंतर परूश्यांनीं जाऊन त्याला बोलण्यामध्यें
पाशांत कसें पाडावें यासंबंधानें मसलत केली. १६ त्यांनीं
आपल्या शिष्यांस हेरोदीयांसह त्याजकडे पाठवून म्हटलें,
गुरुजी, आम्हांस ठाऊक आहे कीं आपण खरे आहां,
देवाचा मार्ग खरेपणानें सांगतां, व कोणाची भीड धरीत
नाहीं; कारण आपण तोंड पाहून बोलत नाहीं. १७
आपणाला कसें वाटतें हें आम्हांस सांगा. कैसराला
कर देणें हें योग्य आहे किंवा नाहीं ? १८ येशू त्यांचें दुष्ट-
पण ओळखून म्हणाला, अहो ढोंग्यांनो, माझी परीक्षा कां
पाहतां ? १९ कराचें नाणें मला दाखवा; तेव्हां त्यांनीं
त्याच्याजवळ एक पावली आणिली. २० त्यानें त्यांस
म्हटलें, हा मुखवटा व हा लेख कोणाचा ? २१ ते म्हणाले,
कैसराचा; त्यानें त्यांस म्हटलें, तर मग कैसराचें तें कैस-
राला, आणि देवाचें तें देवाला भरून द्या. २२ हें ऐकून
त्यांना आश्चर्य वाटलें, व ते त्याला सोडून गेले.

## पुनरुत्थानाविषयींचा प्रश्न

२३ त्याच दिवशीं, पुनरुत्थान होत नाहीं, असें म्हण-
णाऱ्या सदूक्यांनीं त्याच्याकडे येऊन त्याला विचारिलें, २४
गुरुजी, मोशानें सांगितलें आहे कीं 'जर कोणीएक संतान
नसतां मेला तर त्याच्या भावानें त्याच्या स्त्रीबरोबर विवाह
करून आपल्या भावाचा वंश चालवावा.' २५ आम्हांमध्यें
सात भाऊ होते; त्यांतला पहिला लग्न करून मेला आणि
त्याला संतति नसल्यामुळें त्याची बायको त्याच्या भावाची
झाली. २६ याप्रमाणें दुसरा, तिसरा, असे सातहि जण
लग्न करून मेले; २७ आणि सर्वांमागून ती स्त्री मेली.
२८ तर पुनरुत्थानसमयीं ती त्या सात जणांतून कोणाची
बायको होईल ? कारण ती त्या सर्वांची झाली होती.

२९ येशूनें त्यांस उत्तर दिलें: तुम्हांस शास्त्र व देवाचें
सामर्थ्य न कळल्यामुळें तुम्ही भ्रमांत पडलां आहां. ३०
कारण पुनरुत्थानांत ते लग्न करून घेत नाहींत व लग्न करून
देतहि नाहींत; तर स्वर्गांतील देवदूतांप्रमाणें असतात. ३१
मृतांच्या पुनरुत्थानाविषयीं देवानें तुम्हांस सांगितलें तें
तुमच्या वाचण्यांत आलें नाहीं काय ? ३२ तें असें कीं,
'मी अब्राहामाचा देव, इसहाकाचा देव व याकोबाचा देव
आहें.' देव मृतांचा नव्हे, जीवंतांचा आहे. ३३ हें ऐकून
लोकसमुदायांस त्याच्या शिक्षणाचें आश्चर्य वाटलें.

### सर्वांत मोठ्या आज्ञेविषयींचा प्रश्न

३४ त्यानें सदूकी यांस कुंठित केलें असें ऐकून परूशी
एकत्र जमले; ३५ आणि त्यांतील एका शास्त्र्यानें त्याची
परीक्षा पाहण्याकरितां विचारलें: ३६ गुरुजी, नियम-
शास्त्रांतील कोणती आज्ञा मोठी आहे ? ३७ तो त्याला
म्हणाला, 'तूं आपला देव परमेश्वर याजवर पूर्ण
अंतःकरणानें, पूर्ण जिवानें व पूर्ण मनानें प्रीति कर;' ३८
हीच मोठी व पहिली आज्ञा आहे. ३९ हिच्यासारखी
दुसरी एक ही आहे कीं 'तूं आपल्या शेजाऱ्यावर
आपणासारखी प्रीति कर.' ४० या दोन आज्ञांवर सर्व
नियमशास्त्र व संदेष्टशास्त्र हीं अवलंबून आहेत.

### मशीहाविषयींचा प्रश्न

४१ परूशी एकत्र जमले असतां येशूनें त्यांस विचारिलें:
४२ ख्रिस्ताविषयीं तुम्हांस काय वाटतें ? तो कोणाचा पुत्र
आहे ? ते त्याला म्हणाले, दाविदाचा. ४३ त्यानें त्यांस
म्हटलें, तर मग दाविदानें आत्म्याच्या प्रेरणेनें त्याला प्रभु
असें कसें म्हटलें ? तो म्हणतो,
४४ परमेश्वरानें माझ्या प्रभूला सांगितलें,
मी तुझ्या शत्रूंस तुझ्या पायांखालीं घालीपर्यंत तूं
माझ्या उजवीकडे बैस.
४५ दावीद जर त्याला प्रभु म्हणतो तर तो त्याचा पुत्र
कसा होईल ? ४६ तेव्हां कोणाला त्यास उत्तर देतां
येईना; आणि त्या दिवसापासून त्याला आणखी कांहीं
विचारावयास कोणीहि धजला नाहीं.

### शास्त्री व परूशी यांचा येशू जाहीरपणें निषेध करतो

२३
१ तेव्हां येशू लोकसमुदायांस व आपल्या
शिष्यांस म्हणाला, २ शास्त्री व परूशी हे मोशाच्या
आसनावर बसले आहेत; ३ यास्तव ते जें कांहीं
तुम्हांस सांगतील तें अवघें आचरा व पाळा, परंतु त्यांच्या
करण्याप्रमाणें करूं नका; कारण ते सांगतात पण करीत
नाहींत. ४ जड आणि वाहावयास कठीण अशीं ओझीं
बांधून ते लोकांच्या खांद्यांवर देतात, परंतु तीं सारण्यास ते
स्वतः बोटहि लावावयाचे नाहींत; ५ आणि आपलीं सर्व कामें
लोकांनीं पाहावीं म्हणून ते तीं करितात, आपलीं मंत्रपत्रें रुंद
करितात, व आपले गोंडे मोठे करितात; ६ जेवणावळींतील
श्रेष्ठ स्थानें, सभास्थानांतील श्रेष्ठ आसनें, ७ बाजारांत
नमस्कार घेणें व लोकांकडून गुरुजी असें म्हणवून घेणें हीं
त्यांस आवडतात. ८ तुम्ही तर आपणांस गुरुजी असें
म्हणवून घेऊं नका; कारण तुमचा गुरु एक आहे, व तुम्ही
सर्व भाऊभाऊ आहां. ९ पृथ्वीवरील कोणाला बाप म्हणूं
नका, कारण तुमचा पिता एक आहे, तो स्वर्गीय आहे.
१० तसेंच आपणांस स्वामी असें म्हणवून घेऊं नका,
कारण तुमचा स्वामी एक, तो ख्रिस्त आहे. ११ तुम्हां-
मध्यें जो मोठा त्यानें तुमचा सेवक व्हावें. १२ जो कोणी
आपणाला उंच करील तो नीच केला जाईल, आणि जो
कोणी आपणाला नीच करील तो उंच केला जाईल.

१३ अहो शास्त्र्यांनो व परूश्यांनो, अहो ढोंग्यांनो,
तुम्हांस धिक्कार असो ! कारण लोकांनीं आंत जाऊं नये
म्हणून तुम्ही स्वर्गाचें राज्य बंद करितां; तुम्ही स्वतः आंत
जात नाहीं व आंत जाणाऱ्यांसहि जाऊं देत नाहीं. [ १४
अहो शास्त्र्यांनो व परूश्यांनो, अहो ढोंग्यांनो, तुम्हांस
धिक्कार असो ! कारण तुम्ही विधवांचीं घरें खाऊन टाकितां
व ढोंगानें लांब लांब प्रार्थना करितां, यामुळें तुम्ही अधिक दंड
पावाल. ] १५ अहो शास्त्र्यांनो व परूश्यांनो, अहो ढोंग्यांनो,
तुम्हांस धिक्कार असो ! कारण तुम्ही एक शिष्य मिळवावया-
साठीं समुद्र व भूमि पायांखालीं घालितां आणि तो मिळाला
म्हणजे तुम्ही त्याला आपणांहून दुप्पट असा नरकपुत्र
करितां.

१६ अहो अंधळ्या वाटाड्यांनो, तुम्हांस धिक्कार असो !
कारण तुम्ही म्हणतां, कोणी मंदिराची शपथ घेतली तर
त्यांत कांहीं नाहीं, परंतु कोणी मंदिराच्या सोन्याची शपथ

घेतली तर तो ऋणी आहे. १७ अहो मूर्ख व अंधळे
लोकहो, मोठें कोणतें, तें सोनें किंवा ज्याच्या योगानें तें
सोनें पवित्र झालें तें मंदिर? १८ तुम्ही म्हणतां, कोणी
वेदीची शपथ घेतली तर त्यांत कांहीं नाहीं; परंतु कोणी
तिच्यावरील अर्पणाची शपथ घेतली तर तो ऋणी आहे.
१९ अहो अंधळ्यांनो, मोठें कोणतें; अर्पण किंवा अर्पण
पवित्र करणारी वेदी? २० यास्तव जो कोणी वेदीची
शपथ घेतो तो तिची व तिच्यावर जें कांहीं आहे त्याची
शपथ घेतो; २१ आणि जो मंदिराची शपथ घेतो तो त्याची
व त्यांत राहणाऱ्याची शपथ घेतो; २२ आणि जो स्वर्गाची
शपथ घेतो तो देवाच्या राजासनाची व त्यावर बसणा-
ऱ्याची शपथ घेतो.

२३ अहो शास्त्र्यांनो व परूश्यांनो, अहो ढोंग्यांनो,
तुम्हांस धिक्कार असो! कारण पुदिना, शेप व जिरे यांचा
दशांश तुम्ही देतां, आणि नियमशास्त्रांतील मुख्य गोष्टी,
म्हणजे न्याय, दया व विश्वास ह्या तुम्हीं सोडिल्या आहेत;
ह्या करावयाच्या होत्या, तरी त्या सोडावयाला पाहिजे
होत्या असें नाहीं. २४ अहो अंधळ्या वाटाड्यांनो, तुम्ही
मुरकूट गाळून काढितां व उंट गिळून टाकितां.

२५ अहो शास्त्र्यांनो व परूश्यांनो, अहो ढोंग्यांनो, तुम्हांस
धिक्कार असो! तुम्ही ताटवाटी बाहेरून साफ करितां, पण
तीं आंतून जुलूम व असंयम यांनीं भरलीं आहेत. २६ अरे
अंधळ्या परूश्या, पहिल्यानें वाटी आंतून साफ कर, म्हणजे
ती बाहेरूनहि साफ होईल.

२७ अहो शास्त्र्यांनो व परूश्यांनो, अहो ढोंग्यांनो,
तुम्हांस धिक्कार असो! कारण तुम्ही चुना लावलेल्या
कबरांसारिखे आहां, त्या बाहेरून सुंदर दिसतात, परंतु
आंत मेलेल्यांच्या हाडांनीं व सर्व प्रकारच्या मळानें भर-
लेल्या आहेत; २८ तसें तुम्ही बाहेरून लोकांस धार्मिक
दिसतां, परंतु आंत ढोंगानें व अधर्मानें भरलेले आहां.

२९ अहो शास्त्र्यांनो व परूश्यांनो, अहो ढोंग्यांनो,
तुम्हांस धिक्कार असो! कारण तुम्ही संदेष्ट्यांच्या कबरा
बांधितां व धार्मिक लोकांचीं थडीं शृंगारितां; ३० आणि
म्हणतां, आम्ही आपल्या वडिलांच्या दिवसांत असतों तर
संदेष्ट्यांचा रक्तपात करण्यांत त्यांचे भागीदार झालों नसतों.
३१ यावरून तुम्ही संदेष्ट्यांचा घात करणाऱ्यांचे पुत्र आहां,
अशी तुम्ही स्वतःच साक्ष देतां; ३२ यास्तव तुम्ही
आपल्या वडिलांचें माप भरा. ३३ अहो सापांनो, सापांच्या
पिलांनो, नरकदंड कसा चुकवाल? ३४ पाहा, मी तुम्हां-
कडे संदेष्टे, ज्ञानी व शास्त्री यांस पाठवितों; तुम्ही त्यांतील
कित्येकांस जिवें माराल व वधस्तंभावर खिळाल आणि
कित्येकांस आपल्या सभास्थानांमध्यें फटके माराल, व नगरो-
नगरीं त्यांचा पाठलाग कराल; ३५ यासाठीं कीं धार्मिक
हाबेल याच्या रक्तापासून, वेदी व पवित्रस्थान यांमध्यें
ज्याला तुम्हीं जिवें मारिलें तो बरख्याचा पुत्र जखऱ्या
याच्या रक्तापर्यंत, जें सर्व धार्मिक लोकांचें रक्त पृथ्वीवर
पाडण्यांत आलें तें तुम्हांवर यावें. ३६ मी तुम्हांस खचीत
सांगतों, हें सर्व या पिढीवर येईल.

## यरुशलेमाच्या भवितव्याबाबत येशूनें काढलेले दुःखोद्गार

३७ यरुशलेमा, यरुशलेमा, संदेष्ट्यांचा घात करणाऱ्या,
व तुजकडे पाठविलेल्यांस दगडमार करणाऱ्या! जशी कोंबडी
आपलीं पिलें पंखांखालीं एकवटते त्या प्रकारें तुझ्या मुलां-
बाळांना एकवटावयाची कितीदां माझी इच्छा होती, पण
तुमची इच्छा नव्हती! ३८ पाहा, ‘तुमचें घर तुम्हांलाच
ओसाड सोडिलें आहे.’ ३९ मी तुम्हांस सांगतों कीं
आतांपासून ‘प्रभूच्या नामानें येणारा तो धन्यवादित,’ असें
म्हणाल तोंपर्यंत मी तुमच्या दृष्टीस पडणारच नाहीं.

## मंदिराची धूळधाण व युगाची समाप्ति यांविषयींचें येशूचें भविष्य

२४ १ मग येशू मंदिरांतून बाहेर निघून चालला
असतां त्याचे शिष्य त्याला मंदिराच्या इमारती
दाखवावयास जवळ आले. २ तेव्हां येशू त्यांस
म्हणाला, हें सर्व तुम्ही पाहतां ना? मी तुम्हांस खचीत
सांगतों, पाडला जाणार नाहीं असा दगडावर दगड येथें
राहणार नाहीं.

३ तो जैतूनांच्या डोंगरावर बसला असतां शिष्य त्या-
कडे एकटे येऊन म्हणाले, या गोष्टी केव्हां होतील आणि
आपल्या येण्याचें व या युगाच्या समाप्तीचें चिन्ह काय,
हें आम्हांस सांगा. ४ येशूनें त्यांस उत्तर दिलें, तुम्हांस

कोणीं फसवूं नये म्हणून जपा. ५ कारण पुष्कळ जण माझ्या
नामानें येऊन मी ख्रिस्त आहें असें म्हणतील व बहुतांस
फसवितील. ६ तुम्ही लढायांविषयीं ऐकाल व लढायांच्या
आवया ऐकाल, तेव्हां संभाळा; घाबरूं नका, कारण 'असें
होणें अवश्य आहे;' परंतु तेवढ्यांत शेवट होत नाहीं. ७
कारण 'राष्ट्रावर राष्ट्र व राज्यावर राज्य उठेल' आणि
जागोजागीं दुष्काळ व भूमिकंप होतील; ८ पण सर्व वेद-
नांचा हा प्रारंभ होय. ९ तेव्हां तुमचे हाल करण्याकरितां
ते तुम्हांस धरून देतील व तुम्हांस जिवें मारितील; आणि
माझ्या नामामुळें सर्व राष्ट्रें तुमचा द्वेष करितील. १० त्या
वेळीं 'बहुत अडखळतील' व एकमेकांस धरून देतील, व
एकमेकांचा द्वेष करितील; ११ पुष्कळसे खोटे संदेष्टे
होतील व बहुतांस फसवितील; १२ आणि अधर्म वाढल्या-
मुळें पुष्कळांची प्रीति थंडावेल; १३ परंतु शेवटपर्यंत जो
टिकेल तोच तरेल. १४ सर्व राष्ट्रांस साक्ष व्हावी म्हणून
राज्याची ही सुवार्ता सर्व जगांत गाजवितील; तेव्हां शेवट
होईल.

१५ दानीएल संदेष्ट्याच्या द्वारें सांगितलेला 'ओसा-
डीचा अमंगळ पदार्थ पवित्रस्थानांत' उभा असलेला तुम्ही
पाहाल, (वाचणाऱ्यानें हें ध्यानांत आणावें,) १६ तेव्हां
जे यहूदीयांत असतील त्यांनीं डोंगरांकडे पळून जावें; १७
जो धाब्यावर असेल त्यानें आपल्या घरांतील कांहीं बाहेर
काढण्याकरितां खालीं उतरूं नये; १८ आणि जो शेतांत
असेल त्यानें आपलें वस्त्र नेण्याकरितां माघारें येऊं नये.
१९ त्या दिवसांत गरोदर व स्तन पाजणाऱ्या स्त्रिया अस-
तील त्यांचें दुःख फारच होणार! २० तुमचें पलायन
हिंवाळ्यांत किंवा शब्बाथ दिवशीं हो नये म्हणून प्रार्थना
करा. २१ कारण 'जगाच्या प्रारंभापासून आजपर्यंत आलें
नाहीं व येणारहि नाहीं, असें मोठें संकट' त्या काळीं
येईल; २२ आणि ते दिवस थोडे केले नसते तर कोणाहि
मनुष्याचा निभाव लागला नसता; म्हणून निवडलेल्यांसाठीं
ते थोडे केले जातील. २३ त्या वेळेस कोणी तुम्हांस म्हणेल,
पाहा, ख्रिस्त येथें आहे किंवा तेथें आहे, तर खरें मानूं
नका. २४ कारण खोटे ख्रिस्त व 'खोटे संदेष्टे' होतील व
अशीं मोठीं 'चिन्हें व अद्भुतें दाखवितील' कीं साधेल तर
निवडलेल्यांस देखील फसवितील. २५ पाहा, मीं हें अगो-
दरच तुम्हांस सांगून ठेविलें आहे. २६ यास्तव कोणी
तुम्हांस म्हणतील, पाहा, तो अरण्यांत आहे, तर तिकडे
जाऊं नका; तुम्हांस म्हणतील, पाहा तो आंतल्या खोल्यांत
आहे, तर खरें मानूं नका. २७ कारण जशी वीज पूर्वेकडून
निघून पश्चिमेपर्यंत चमकते तसें मनुष्याच्या पुत्राचें येणें
होईल. २८ जेथें प्रेत असेल तेथें गीध जमतील.

२९ त्या दिवसांतील संकटामागून लागलेंच 'सूर्य
अंधकारमय होईल, चंद्र प्रकाश देणार नाहीं, तारे आका-
शांतून पतन पावतील, व आकाशाचीं बळें डळमळतील.'
३० तेव्हां मनुष्याच्या पुत्राचें चिन्ह आकाशांत दिसेल;
मग 'पृथ्वीवरल्या सर्व जातींचे लोक शोक करितील;' ते
'मनुष्याच्या पुत्राला आकाशाच्या मेघांवर आरूढ होऊन'
पराक्रमानें व मोठ्या वैभवानें 'येतांना' पाहतील. ३१ 'कर-
ण्याच्या महानादाबरोबर' तो आपल्या दूतांस पाठवील,
आणि 'ते आकाशाच्या एका सीमेपासून दुसऱ्या सीमेपर्यंत'
त्याच्या निवडलेल्यांस 'चाऱ्ही दिशांकडून जमा करितील.'

## जागृतीची आवश्यकता

३२ अंजिराच्या झाडावरून दाखला घ्या; त्याची डहाळी
कोमल होऊन पानें फुटूं लागलीं म्हणजे उन्हाळा जवळ
आला असें तुम्ही समजतां; ३३ तसेंच या सर्व गोष्टी
पाहाल तेव्हां तो जवळ दारांनजीक आहे, असें समजा.
३४ मी तुम्हांस खचीत सांगतों, हें सर्व पूर्ण होईपर्यंत ही
पिढी नाहींशी होणार नाहीं. ३५ आकाश व पृथ्वी हीं
नाहींतशीं होतील, परंतु माझीं वचनें नाहींतशीं होणारच
नाहींत. ३६ त्या दिवसाविषयीं व त्या घटकेविषयीं कोणाला
ठाऊक नाहीं, स्वर्गांतील दिव्यदूतांस नाहीं, पुत्रालाहि नाहीं;
पित्याला मात्र ठाऊक आहे. ३७ नोहाच्या दिवसांतल्या-
प्रमाणें मनुष्याच्या पुत्राचें येणें होईल. ३८ तेव्हां जसें
जलप्रलयाच्या पूर्वीच्या दिवसांत 'नोहा नौकेंत जाईपर्यंत'
लोक खातपीत होते, लग्न करून घेत होते, लग्न करून देत
होते, ३९ आणि जलप्रलय येऊन सर्वांस वाहवून नेईपर्यंत
त्यांस समजलें नाहीं; तसेंच मनुष्याच्या पुत्राचें येणें
होईल; ४० त्या वेळेस शेतांत असलेल्या दोघांतून एक
घेतला जाईल, व एक ठेविला जाईल. ४१ जात्यावर

दळीत बसलेल्या दोघींतून एक घेतली जाईल व एक
ठेविली जाईल. ४२ यास्तव जागृत राहा; कारण कोणत्या
दिवशीं तुमचा प्रभु येईल हें तुम्हांस ठाऊक नाहीं. ४३
आणखी हें समजा कीं अमुक प्रहरीं चोर येईल हें घर-
धन्याला कळलें असतें तर तो जागा राहिला असता, आणि
त्यानें आपलें घर फोडूं दिलें नसतें. ४४ यास्तव तुम्हीहि सिद्ध
व्हा, कारण तुम्हांस वाटत नाहीं अशा घटकेस मनुष्याचा
पुत्र येईल.

## विश्वासू व दुष्ट दास यांचा दृष्टांत

४५ आपल्या परिवाराला यथाकाळीं खावयाला देण्यास
ज्याला धन्यानें त्याजवर नेमिलें असा विश्वासू व बुद्धिमान्
दास कोण? ४६ धनी येईल तेव्हां जो दास तसें
करतांना त्याच्या दृष्टीस पडेल, तो धन्य. ४७ मी तुम्हांस
खचीत सांगतों कीं त्याला तो आपल्या सर्वस्वावर नेमील;
४८ परंतु आपला धनी येण्यास विलंब लागेल असें
आपल्या मनांत म्हणून एकादा दुष्ट दास ४९ आपल्या
सोबतीच्या दासांस मारूं लागेल व झिंगलेल्यांबरोबर
खाईलपिईल, ५० तर तो वाट पाहत नाहीं अशा दिवशीं
व त्याला माहीत नाहीं अशा घटकेस त्या दासाचा धनी
येऊन, ५१ त्याला कापून काढील व ढोंग्यांना थावयाचा
वांटा त्याच्या पदरीं बांधील; तेथें रडणें व दांतखाणें
चालेल.

## दहा कुमारींचा दृष्टांत

१ तेव्हां स्वर्गाचें राज्य दहा कुमारींसारखें
२५ होईल; त्या आपले दिवे घेऊन वराला सामोऱ्या
जाण्यास निघाल्या. २ त्यांत पांच मूर्ख होत्या व
पांच शहाण्या होत्या. ३ मूर्ख कुमारींनीं आपले दिवे घेतले
पण आपणांबरोबर तेल घेतलें नाहीं; ४ शहाण्यांनीं आपले
दिवे घेतले व भांड्यांत तेलहि घेतलें. ५ मग वराला विलंब
लागल्यामुळें सर्वांस डुलक्या आल्या व झोप लागली. ६
तेव्हां मध्यरात्रीं अशी हाक झाली कीं पाहा, वर आला
आहे, त्याला सामोऱ्या चला. ७ मग त्या सर्व कुमारी उठून
आपले दिवे नीट करूं लागल्या; ८ तेव्हां मूर्खांनीं शहा-
ण्यांस म्हटलें, तुम्ही आम्हांस आपल्या तेलांतून कांहीं द्या,
कारण आमचे दिवे जाऊं लागले आहेत; ९ पण शहाण्यांनीं
उत्तर दिलें कीं कदाचित् आ ्हांस व तुम्हांस पुरणार नाहीं;
तुम्हीं विकणाऱ्यांच्या येथें जाऊन आपणांकरितां विकत
घ्यावें, हें बरें. १० त्या विकत घ्यावयास गेल्या इतक्यांत
वर आला; तेव्हां ज्या सिद्ध होत्या त्या त्याच्याबरोबर
लग्नास आंत गेल्या, आणि दार बंद झालें. ११ नंतर त्या
दुसऱ्याहि कुमारी येऊन म्हणाल्या, प्रभुजी, प्रभुजी,
आम्हांला दार उघडा. १२ त्यानें उत्तर दिलें, मी तुम्हांस
खचीत सांगतों, मी तुम्हांस ओळखीत नाहीं. १३ यास्तव
तुम्ही जागृत राहा, कारण तुम्हांस तो दिवस किंवा ती
घटका ठाऊक नाहीं.

## रुपयांचा दृष्टांत

१४ कारण ज्याप्रमाणें परदेशीं जाणाऱ्या एका मनुष्यानें
आपल्या दासांस बोलावून त्यांस आपली मालमत्ता
सोपुन दिली, त्याप्रमाणें हें आहे. १५ एकाला त्यानें पांच
हजार रुपये, एकाला दोन हजार व एकाला एक
हजार असे ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें दिले; आणि
तो प्रवासास गेला. १६ ज्याला पांच हजार मिळाले
होते त्यानें लागलेंच जाऊन त्यांवर व्यापार केला व
आणखी पांच हजार मिळविले. १७ तसेंच ज्याला दोन
हजार मिळाले होते त्यानेंहि आणखी हजार मिळविले;
१८ परंतु ज्याला एक हजार मिळाले होते त्यानें जाऊन
भूमि खणिली, व तींत आपल्या धन्याचा पैका लपविला.
१९ मग बहुत काळानंतर त्या दासांचा धनी आला, व
त्यांचा हिशेब घेऊं लागला. २० तेव्हां ज्याला पांच हजार
मिळाले होते तो आणखी पांच हजार आणून म्हणाला,
महाराज, आपण मला पांच हजार रुपये सोपून दिले होते,
पाहा, त्यांवर मीं आणखी पांच हजार मिळविले आहेत.
२१ त्याला त्याच्या धन्यानें म्हटलें: शाबास, भल्या व
विश्वासू दासा, तूं थोडक्याविषयीं विश्वासू झालास, मी तुला
पुष्कळांवर नेमणूक करीन; आपल्या धन्याचें सुख भोगाव-
यास ये. २२ नंतर ज्याला दोन हजार मिळाले होते तोहि
येऊन म्हणाला, महाराज, आपण मला दोन हजार रुपये
सोपून दिले होते; पाहा, त्यांवर मीं आणखी दोन हजार
मिळविले आहेत. २३ त्याला त्याच्या धन्यानें म्हटलें,
शाबास, भल्या व विश्वासू दासा, तूं थोडक्याविषयीं विश्वासू

झालास; मी तुझी पुष्कळावर नेमणूक करीन; आपल्या
धन्याचें सुख भोगावयास ये. २४ मग ज्याला एक हजार
मिळाले होते तोहि येऊन म्हणाला, महाराज, आपण कठोर
मनुष्य आहां; जेथें आपण पेरिलें नाहीं तेथें कापणी करितां;
व जेथें पसरिलें नाहीं तेथून जमा करितां, असें मला
आपणाविषयीं कळलें; २५ म्हणून मीं भिऊन आपले
हजार रुपये भूमींत लपवून ठेविले होते; पाहा, ते तुमचे
तुम्हांस मिळाले आहेत. २६ तेव्हां त्याच्या धन्यानें
त्याला उत्तर दिलें, अरे दुष्ट व आळशी दासा, जेथें मीं
पेरिलें नाहीं तेथें कापितों, व पसरिलें नाहीं तेथून गोळा
करितों, हें तुला ठाऊक होतें; २७ तर माझें द्रव्य सावकारां-
कडे ठेवावयाचें असतें, म्हणजे मी आल्यावर माझें मला
सव्याज मिळालें असतें. २८ यास्तव हे हजार रुपये
याजपासून घ्या, आणि ज्याच्याजवळ दहा हजार आहेत
त्याला द्या. २९ कारण ज्याच्याजवळ आहे त्याला
दिलें जाईल व त्याला विपुल होईल; आणि ज्याच्याजवळ
नाहीं त्याच्याजवळ जें असेल तें देखील त्याजपासून घेतलें
जाईल; ३० आणि ह्या निरुपयोगी दासाला बाहेरील
अंधारांत टाका, तेथें रडणें व दांतखाणें चालेल.

## न्यायाचा दिवस

३१ जेव्हां मनुष्याचा पुत्र आपल्या वैभवानें ‘येईल,
व त्याजबरोबर सर्व देवदूत’ येतील, तेव्हां तो आपल्या
वैभवी राजासनावर बसेल; ३२ त्यांजपुढें सर्व राष्ट्रें जम-
विलीं जातील; आणि असें मेंढपाळ शेरडांपासून मेंढरें
वेगळीं करितो तसें तो त्यांस एकमेकांपासून वेगळें करील.
३३ मेंढरांस तो आपल्या उजवीकडे ठेवील व शेरडांस
डावीकडे ठेवील. ३४ तेव्हां राजा आपल्या उजवीकड-
ल्यांस म्हणेल, अहो माझ्या पित्याचे आशीर्वादितहो या; जें
राज्य जगाच्या स्थापनेपासून तुम्हांकरितां सिद्ध केलें तें
वतन करून घ्या. ३५ कारण मी भुकेला होतों तेव्हां
तुम्हीं मला खावयास दिलें; तान्हेला होतों तेव्हां मला प्याव-
यास दिलें; परका होतों तेव्हां मला घरांत घेतलें; ३६
उघडा होतों तेव्हां मला वस्त्र दिलें; आजारी होतों तेव्हां
माझा समाचार घेतला; बंदिशाळेंत होतों तेव्हां तुम्ही
मजकडे आलां. ३७ त्या वेळेस धार्मिक लोक त्याला उत्तर
देतील कीं, प्रभुजी, आम्हीं आपणाला केव्हां भुकेलें पाहून
खावयास दिलें? केव्हां तान्हेलें पाहून प्यावयास दिलें?
३८ आपणाला परकें पाहून केव्हां घरांत घेतलें? उघडें
पाहून केव्हां वस्त्र दिलें? ३९ आणि आपणाला आजारी
अथवा बंदिशाळेंत पाहून केव्हां आपणाकडे आम्ही आलों?
४० तेव्हां राजा त्यांस उत्तर देईल, मी तुम्हांस खचीत
सांगतों कीं ज्या अर्थी तुम्हीं या माझ्या अति कनिष्ठ बंधूं-
तील एकाला केलें त्या अर्थी तें मलाच केलें आहे. ४१
मग डावीकडल्यांसहि तो म्हणेल, अहो शापग्रस्तहो, सैतान
व त्याचे दूत यांसाठीं जो सार्वकालिक अग्नि सिद्ध केला आहे
त्यांत माझ्यापुढून जा. ४२ कारण मी भुकेला होतों
तेव्हां तुम्हीं मला खावयास दिलें नाहीं; तान्हेला होतों
तेव्हां मला प्यावयास दिलें नाहीं; ४३ परका होतों तेव्हां
मला घरांत घेतलें नाहीं; उघडा होतों तेव्हां मला वस्त्र
दिलें नाहीं; आजारी व बंदिशाळेंत होतों तेव्हां माझा
समाचार घेतला नाहीं. ४४ त्या वेळेस हेहि त्याला उत्तर
देतील, प्रभुजी, आम्हीं केव्हां आपणाला भुकेलें, तान्हेलें,
परकें, उघडें, आजारी किंवा बंदिशाळेंत पाहून आपली
सेवा केली नाहीं? ४५ तेव्हां तो त्यांस उत्तर देईल, मी
तुम्हांस खचीत सांगतों, तुम्हीं ज्या अर्थी या अति
कनिष्ठांतील एकालाहि केलें नाहीं त्या अर्थी तें मला केलें
नाहीं. ४६ ‘ते तर सार्वकालिक’ दंड भोगावयास जातील;
आणि धार्मिक लोक ‘सार्वकालिक जीवन भोगावयास’
जातील.

## येशूला ठार मारण्याचा कट

२६ १ मग असें झालें कीं येशूनें हीं सर्व वचनें
समाप्त केल्यावर आपल्या शिष्यांस म्हटलें, २
तुम्हांस ठाऊक आहे कीं दोन दिवसांनीं वल्हांडण
सण आहे, आणि मनुष्याच्या पुत्राला वधस्तंभावर खिळवि-
ण्याकरितां धरून देतील. ३ तेव्हां कयफा नामक प्रमुख
याजकाच्या वाड्यांत मुख्य याजक व लोकांचे वडील जन
जमले; ४ आणि येशूला कपटानें धरून जिवें मारावें अशी
त्यांनीं मसलत केली; ५ परंतु लोकांमध्यें गडबड होऊं नये
म्हणून हें सणांत नको, असें त्यांनीं म्हटलें.

## बेथानी येथें येशूस करण्यांत आलेला तैलाभ्यंग

६ तेव्हां येशू बेथानींत कुष्ठरोगी शिमोन याच्या घरीं असतां, ७ कोणीएक स्त्री बहुमोल सुगंधी तेलाची अलाबास्त्र कुपी घेऊन त्याजकडे आली, आणि तो भोजनास बसला असतां तिनें त्याच्या मस्तकावर ती ओतिली. ८ हें पाहून त्याचे शिष्य रागावून म्हणाले, हा नाश कशाला केला? ९ हें सुगंधी तेल विकून पुष्कळ पैसे आले असते व ते गरिबांस देतां आले असते. १० येशूनें हें पाहून त्यांस म्हटलें, या स्त्रीला कां त्रास देतां? इनें तर माझ्यासाठीं चांगलें कृत्य केलें. ११ गरीब नेहमीं तुम्हांजवळ आहेत, परंतु मी तुम्हांजवळ नेहमीं आहें असें नाहीं. १२ इनें सुगंधी तेल माझ्या शरीरावर ओतिलें हें माझ्या उत्तरकार्यासाठीं केलें. १३ मी तुम्हांस खचीत सांगतों, सर्व जगांत जेथें जेथें ही सुवार्ता गाजवितील तेथें इनें जें केलें आहे तेंहि इच्या स्मरणार्थ सांगतील.

## यहूदा विश्वासघात करतो

१४ तेव्हां यहूदा इस्कर्योत नांवाच्या बारांतील एकानें मुख्य याजकांकडे जाऊन म्हटलें, १५ मीं त्याला धरून तुमच्या स्वाधीन केलें तर मला काय द्याल? 'त्यांनीं त्याला तीस रुपये तोलून दिले.' १६ तेव्हांपासून तो त्याला धरून देण्याची संधि पाहूं लागला.

## शेवटलें भोजन

१७ नंतर बेखमीर भाकरीच्या सणाच्या पहिल्या दिवशीं येशूकडे शिष्य येऊन म्हणाले, आपणाकरितां वल्हांडणाच्या भोजनाची तयारी आम्हीं कोठें करावी म्हणून आपली इच्छा आहे? १८ त्यानें म्हटलें, नगरांत अमुक एका इसमाकडे जाऊन त्याला सांगा कीं गुरु म्हणतो, माझी वेळ जवळ आली आहे, मी आपल्या शिष्यांसहित तुझ्या येथें वल्हांडण सण करितों. १९ मग येशूनें सांगितल्याप्रमाणें शिष्यांनीं जाऊन वल्हांडणाची तयारी केली.

२० संध्याकाळ झाल्यावर तो बारा शिष्यांसहित भोजनास बसला; २१ आणि ते भोजन करीत असतां त्यानें म्हटलें, मी तुम्हांस खचीत सांगतों, तुम्हांतील एक जण मला धरून देईल. २२ तेव्हां ते फार खिन्न झाले आणि प्रत्येक जण त्याला विचारूं लागला, प्रभुजी, मी आहें काय तो? २३ त्यानें उत्तर दिलें कीं ज्यानें मजबरोबर ताटांत हात घातला तोच मला धरून देईल. २४ मनुष्याच्या पुत्राविषयीं जसें लिहिलें आहे तसा तो जातो खरा; परंतु जो मनुष्याच्या पुत्राला धरून देतो त्या मनुष्याला धिक्कार असो! तो मनुष्य जन्मला नसता तर तें त्याला बरें होतें. २५ तेव्हां त्याला धरून देणारा यहूदा यानें विचारिलें, गुरुजी, मी आहें काय तो? तो त्याला म्हणाला, तूं म्हटलेंस तसेंच.

२६ मग ते भोजन करीत असतां येशूनें भाकर घेऊन व आशीर्वाद देऊन ती मोडिली; आणि शिष्यांस देऊन म्हटलें, घ्या, खा, हें माझें शरीर आहे; २७ आणि त्यानें प्याला घेतला व ईशोपकारस्मरण करून तो त्यांस दिला, व म्हटलें, तुम्ही सर्व यांतील प्या. २८ हें माझें [ नव्या ] 'कराराचें रक्त' आहे; हें पापांची क्षमा होण्यासाठीं बहुतांकरितां ओतिलें जात आहे. २९ मी तुम्हांस सांगतों कीं मी आपल्या पित्याच्या राज्यांत तुम्हांबरोबर नवा पिईपर्यंत एथून पुढें द्राक्षीचा हा उपज पिणारच नाहीं.

## शिष्य आपल्याला सोडून जातील याबाबत येशूचें भविष्य

३० नंतर गीत गाऊन ते जैतूनांच्या डोंगरावर निघून गेले.

३१ तेव्हां येशू त्यास म्हणाला, तुम्ही सर्व याच रात्रीं मजविषयीं अडखळाल; कारण असें लिहिलें आहे कीं 'मी मेंढपाळाला मारीन, आणि कळपांतल्या मेंढरांची दाणादाण होईल;' ३२ परंतु उठल्यावर मी तुमच्यापूर्वी गालीलांत जाईन. ३३ पेत्रानें त्याला उत्तर दिलें कीं तुजविषयीं सर्व अडखळले तरी मी कधींहि अडखळणार नाहीं. ३४ येशूनें त्याला म्हटलें, मी तुला खचीत सांगतों कीं याच रात्रीं कोंबडा आरवण्यापूर्वी तूं तीन वेळां मला नाकारशील. ३५ पेत्र त्याला म्हणाला, तुजबरोबर मला मरावें लागलें तरी मी तुला नाकारणार नाहींच; सर्व शिष्यांनींहि तसेंच म्हटलें.

## गेथशेमाने बागेंत येशू

३६ नंतर येशू त्यांजबरोबर गेथशेमाने या नांवाच्या ठिकाणीं आला; आणि शिष्यांस म्हणाला, मी थोडा पुढें जाऊन प्रार्थना करीपर्यंत येथें बसा. ३७ मग त्यानें पेत्र व

जब्दीचे दोघे पुत्र यांस बरोबर घेतलें; आणि तो खिन्न व
अति कष्टी होऊं लागला. ३८ तेव्हां त्यानें त्यांस म्हटलें,
'माझा जीव' मरणप्राय, 'अति खिन्न झाला आहे;'
तुम्ही येथें राहा व माझ्याबरोबर जागृत असा. ३९ मग
तो कांहींसें पुढें जाऊन पालथा पडला, आणि त्यानें अशी
प्रार्थना केली: हे माझ्या बापा, होईल तर हा प्याला मज-
वरून टळून जावो; तथापि माझ्या इच्छेप्रमाणें नको तर
तुझ्या इच्छेप्रमाणें होवो. ४० मग तो शिष्यांकडे आला,
आणि ते झोपी गेले आहेत असें पाहून पेत्राला म्हणाला,
काय! घटकाभरहि माझ्याबरोबर तुमच्यानें जागवत
नाहीं? ४१ तुम्हीं परीक्षेंत पडूं नये म्हणून जागृत राहा
व प्रार्थना करा; आत्मा उत्सुक आहे खरा, तरी देह
अशक्त आहे. ४२ आणखी त्यानें दुसऱ्यांदा जाऊन अशी
प्रार्थना केली: हे माझ्या बापा, हें प्याल्यावांचून टळून
जात नसलें तर तुझ्या इच्छेप्रमाणें होवो. ४३ मग त्यानें
पुनः येऊन ते झोपी गेले आहेत असें पाहिलें; कारण त्यांचे
डोळे जड झाले होते. ४४ नंतर त्यांस सोडून पुनः
जाऊन त्यानें तिसऱ्यांदा तेच शब्द म्हणून प्रार्थना केली;
४५ आणि तो आपल्या शिष्यांकडे येऊन त्यांस म्हणाला,
आतां झोप व विसावा घ्या; पाहा, घटका जवळ आली
आहे, आणि मनुष्याचा पुत्र पापी लोकांच्या हातीं धरून
दिला जात आहे. ४६ उठा, आपण जाऊं; पाहा, मला
धरून देणारा जवळ आला आहे.

## येशूला अटक करण्यांत येते

४७ तो बोलत आहे इतक्यांत, पाहा, बारांतील एक
जो यहूदा तो आला आणि त्याबरोबर मुख्य याजक व
लोकांचे वडील यांजकडला मोठा समुदाय तरवारी व सोटे
घेऊन आला. ४८ त्याला धरून देणारा यानें त्यांस अशी
खूण सांगून ठेविली होती कीं मी ज्याचें चुंबन घेईन तोच
तो आहे, त्याला धरा. ४९ मग त्यानें लागलेंच येशूजवळ
येऊन, गुरुजी, सलाम, असें म्हणून त्याचीं पुष्कळ चुंबनें
घेतलीं. ५० येशूनें त्याला म्हटलें, गड्या, ज्याकरितां
आलास तें कर. तेव्हां त्यांनीं जवळ येऊन येशूवर हात
टाकून त्याला धरिलें. ५१ मग पाहा, येशूबरोबर जे होते
त्यांतून एकानें हात लांब करून आपली तरवार उपसली व
प्रमुख याजकाच्या दासावर प्रहार करून त्याचा कान कापून
टाकिला. ५२ तेव्हां येशू त्याला म्हणाला, तूं आपली
तरवार परत जागच्या जागीं घाल, कारण तरवार धरणारे
सर्व जण तरवारीनें नाश पावतील. ५३ मला आपल्या
पित्याजवळ मागतां येत नाहीं, आणि आतां तो मला
देवदूतांच्या बारा सैन्यांपेक्षां अधिक पाठवून देणार नाहीं,
असें तुला वाटतें काय? ५४ एरवीं, असें झालें पाहिजे,
हें म्हणणारे शास्त्रलेख कसे पूर्ण व्हावे? ५५ त्या समयीं
येशू लोकसमुदायांस म्हणाला, जसें लुटारूवर तरवारी व
सोटे घेऊन जावें तसें तुम्ही मला धरावयास बाहेर आलां
काय? मी प्रतिदिवशीं मंदिरांत बसून शिक्षण देत असें,
तरी तुम्हीं मला धरिलें नाहीं; ५६ पण संदेष्ट्यांचे
लेख पूर्ण व्हावे म्हणून हें सर्व झालें. इतक्यांत सर्व
शिष्य त्याला सोडून पळाले.

## मुख्य याजकापुढें येशूची चौकशी

५७ मग येशूला धरणाऱ्यांनीं त्याला प्रमुख याजक
कयफा याच्या घरीं शास्त्री व वडील जमले होते तेथें
नेलें. ५८ पेत्र तर प्रमुख याजकाच्या वाड्यापर्यंत दुरून
त्याच्या मागेमागें चालत गेला, व आंत जाऊन त्याचा
शेवट काय होतो हें पाहावयास कामदारांमध्यें बसला.
५९ मुख्य याजक व संपूर्ण न्यायसभा यांनीं येशूला
जिवें मारावें ह्या हेतूनें त्याजविरुद्ध खोटी साक्ष मिळावी
म्हणून शोध केला; ६० आणि बहुत खोटे साक्षी आले
असतांहि ती त्यांस मिळाली नाहीं. तरी शेवटीं दोघे जण
येऊन म्हणाले कीं ६१ देवाचें मंदिर मोडावयास व तीन
दिवसांत तें बांधावयास मी समर्थ आहें, असें त्यानें म्हटलें.
६२ तेव्हां प्रमुख याजक उठून त्याला म्हणाला, तूं कांहींच
उत्तर देत नाहींस काय? हे तुझ्याविरुद्ध कशी साक्ष
देतात? ६३ तथापि येशू उगाच राहिला. यावरून प्रमुख
याजकानें त्याला म्हटलें, मी तुला जीवंत देवाची शपथ
घालून विचारितों कीं, देवाचा पुत्र ख्रिस्त तो तूं आहेस
कीं नाहींस हें आम्हांस सांग. ६४ येशू त्याला म्हणाला,
तूं म्हटलेंस तसेंच. आणखी मी तुम्हांस सांगतों, यापुढें
तुम्ही 'मनुष्याच्या पुत्राला सर्वसमर्थाच्या उजवीकडे
बसलेलें व आकाशाच्या मेघांवर आरूढ होऊन येतांना

पाहाल.[1] ६५ तेव्हां प्रमुख याजकानें आपलीं वस्त्रें फाडून म्हटलें, यानें दुर्भाषण केलें आहे; आम्हांस आणखी साक्षीदार कशास पाहिजेत? पाहा, आतां तुम्हीं हें दुर्भाषण ऐकलें आहे, ६६ तुम्हांस कसें वाटतें? त्यांनीं उत्तर दिलें कीं हा मरणदंडास पात्र आहे. ६७ तेव्हां ते त्याच्या तोंडावर थुंकले, व त्यांनीं त्याला बुक्क्या मारिल्या; आणि कोणीं त्याला चपडाका मारून म्हटलें, ६८ अरे ख्रिस्ता, आम्हांबरोबर अंतर्ज्ञानानें बोल; तुला कोणीं मारिलें?

### पेत्र येशूचा इनकार करतो

६९ इकडे पेत्र वाड्यांत बाहेर बसला होता; तेव्हां एक दासी त्याजकडे येऊन म्हणाली, तूंहि गालीलकर येशूबरोबर होतास. ७० तो सर्वांच्यासमोर नाकारून बोलला, तूं जें म्हणत्येस तें मला ठाऊक नाहीं. ७१ मग तो बाहेर देवडीवर गेल्यावर दुसरीनें त्याला पाहून तेथल्या लोकांस म्हटलें, हाहि नासोरी येशूबरोबर होता. ७२ पुन: तो शपथ वाहून नाकारून बोलला कीं मी त्या मनुष्याला ओळखीत नाहीं. ७३ नंतर कांहीं वेळानें तेथें उभे राहणारे लोक जवळ येऊन पेत्राला म्हणाले, खरोखर तूंहि त्यांतला आहेस, कारण तुझ्या बोलण्यावरून तूं कोण आहेस हें दिसून येतें. ७४ तेव्हां तो शापोच्चारण करून व शपथा वाहून म्हणूं लागला कीं मी त्या मनुष्याला ओळखीत नाहीं. इतक्यांत कोंबडा आरवला. ७५ तेव्हां कोंबडा आरवण्यापूर्वी तीन वेळां तूं मला नाकारशील असें जें येशूनें पेत्राला सांगितलें होतें तें त्याला आठवलें, आणि तो बाहेर जाऊन मोठ्या दुःखानें रडला.

### रोमी सुभेदार पिलात याच्यासमोर येशू

२७ १ प्रातःकाळ झाल्यावर सर्व मुख्य याजक व लोकांचे वडील यांनीं येशूला जिवें मारण्यासाठीं त्याजविरुद्ध मसलत केली; २ आणि त्यांनीं त्याला बांधून नेऊन पिलात सुभेदाराच्या स्वाधीन केलें.

### यहूदाचा मृत्यु

३ तेव्हां तो शिक्षापात्र ठरला असें पाहून, त्याला धरून देणारा यहूदा यानें पस्तावून, ते तीस रुपये मुख्य याजक व वडील यांजकडे परत आणून म्हटलें, ४ मीं निर्दोष जीवाला धरून देऊन पाप केलें आहे. ते म्हणाले, त्याचें आम्हांस काय? तुझें तूंच पाहा. ५ मग तो ते रुपये मंदिरांत टाकून निघाला, व त्यानें जाऊन गळफास घेतला. ६ मुख्य याजकांनीं ते रुपये घेऊन म्हटलें, हे दानकोशांत टाकण्यास योग्य नाहींत, कारण हें रक्ताचें मोल आहे. ७ मग त्यांनीं आपसांत विचार करून त्या रुपयांचें, परदेशीयांना पुरण्यासाठीं कुंभाराचें शेत विकत घेतलें. ८ यामुळें त्या शेताला रक्ताचें शेत असें आजपर्यंत म्हणतात. ९ तेव्हां जें वचन यिर्मया संदेष्ट्याच्या द्वारें सांगितलें होतें तें पूर्ण झालें; तें असें कीं, ‘आणि ज्याचें मोल इस्राएलाच्या वंशजांपैकीं कांहींनीं ठरविलें, तें त्याचें मोल, म्हणजे ते तीस रुपये, त्यांनीं घेतले, १० आणि प्रभूनें मला आज्ञा केल्याप्रमाणें कुंभाराचें शेत घेण्यासाठीं त्यांनीं दिले.’

### येशूची चौकशी

११ मग येशू सुभेदाराच्या पुढें उभा राहिला असतां सुभेदारानें त्याला विचारिलें, तूं यहूद्यांचा राजा आहेस काय? येशूनें त्याला म्हटलें, तूं म्हणतोस तसेंच. १२ मुख्य याजक व वडील हे त्याजवर दोषारोप करीत असतां त्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं, १३ तेव्हां पिलात त्याला म्हणाला, हे लोक तुझ्याविरुद्ध किती गोष्टींबद्दल साक्ष देतात, हें तूं ऐकत नाहींस काय? १४ परंतु त्यानें त्याला कांहीं उत्तर दिलें नाहीं, एका शब्दानेंहि नाहीं; यावरून सुभेदाराला फार आश्चर्य वाटलें. १५ त्या सणांत लोक जो सांगतील तो बंदिवान सोडून देण्याची सुभेदाराची रीत होती; १६ आणि त्या वेळेस तेथें बरब्बा नामें एक प्रसिद्ध बंदिवान होता. १७ यास्तव ते जमल्यावर पिलातानें त्यांस म्हटलें, मीं तुम्हांकरितां कोणाला सोडावें म्हणून तुमची इच्छा आहे? बरब्बा याला, किंवा ख्रिस्त म्हटलेला येशू याला? १८ कारण त्यांनीं येशूला हेव्यानें धरून दिलें हें त्याला ठाऊक होतें. १९ तो न्यायासनावर बसला असतां त्याच्या स्त्रीनें त्यास असा निरोप पाठविला कीं त्या धार्मिक मनुष्याच्या कामांत तुम्हीं पडूं नका, कारण आज स्वप्नांत त्याच्यामुळें मीं फार दुःख भोगिलें आहे. २० इकडे मुख्य याजक व वडील यांनीं, बरब्बाला मागून घ्यावें व येशूचा नाश करावा, म्हणून लोकसमुदायाचें मन वळवून घेतलें.

२१ सुभेदारानें त्यांस उत्तर दिलें कीं तुम्हांकरितां या
दोघांतून कोणाला सोडावें म्हणून तुमची इच्छा
आहे? ते म्हणाले, बरब्बाला. २२ पिलातानें त्यांस
म्हटलें, तर ख्रिस्त म्हटलेल्या येशूचें मीं काय करावें?
सर्व म्हणाले, त्याला वधस्तंभावर खिळावें. २३
तो म्हणाला, कां? त्यानें काय वाईट केलें आहे?
तेव्हां ते फारच आरडाओरड करून म्हणाले, त्याला
वधस्तंभावर खिळावें. २४ ह्यावरून आपलें कांहींच
चालत नाहीं, उलट अधिकच गडबड होत आहे असें
पाहून पिलातानें पाणी घेऊन समुदायासमोर हात धुऊन
म्हटलें, मी या धार्मिक मनुष्याच्या रक्ताविषयीं निर्दोष
आहें, तुमचें तुम्हीच पाहा. २५ सर्व लोकांनीं उत्तर
दिलें कीं त्याचें रक्त आम्हांवर व आमच्या मुलांबाळांवर
असो. २६ तेव्हां त्यानें त्यांजकरितां बरब्बाला सोडिलें,
व येशूला फटके मारून वधस्तंभावर खिळण्याकरितां
हवालीं केलें.

## येशूला वधस्तंभाला खिळतात

२७ नंतर सुभेदाराच्या शिपायांनीं येशूला कचेरींत
नेलें आणि सगळें पलटण जमवून त्याजवर आणिलें.
२८ त्यांनीं त्याचीं वस्त्रें काढून त्याच्या अंगांत किरमिजी
झगा घातला; २९ कांट्यांचा मुकुट गुंफून त्याच्या
मस्तकावर ठेविला, त्याच्या उजव्या हातांत वेत दिला
आणि त्याच्यापुढें गुडघे टेकून, हे यहूद्यांच्या राजा, तुझा
जयजयकार होवो! असें म्हणून त्यांनीं त्याची थट्टा
मांडिली. ३० ते त्याजवर थुंकले व तो वेत घेऊन त्याच्या
मस्तकावर मारूं लागले. ३१ मग त्याची थट्टा केल्यावर
त्यांनीं त्याच्या अंगांतून तो झगा काढून त्याचीं वस्त्रें
त्याच्या अंगांत घातलीं, आणि त्याला वधस्तंभावर
खिळण्याकरितां नेलें.

३२ ते बाहेर जात असतां शिमोन नामक कोणीएक
कुरेनेकर मनुष्य त्यांस आढळला; त्याला त्यांनीं त्याचा
वधस्तंभ वाहण्याकरितां वेठीस धरिलें.

३३ मग गुलगुथा नांवाची जागा, म्हणजे कवटीची
जागा, येथें येऊन पोंचल्यावर ३४ त्यांनीं त्याला 'पित्तमिश्रित
द्राक्षारस प्यावयास दिला,' परंतु तो चाखून पाहिल्यावर
तो पिईना. ३५ त्याला वधस्तंभावर खिळिल्यावर 'त्यांनीं
चिठ्या टाकून त्याचीं वस्त्रें वांटून घेतलीं.' ३६ नंतर
त्यांनीं तेथें बसून त्याची राखण केली. ३७ त्यांनीं त्याच्या
दोषारोपाचा लेख त्याच्या डोक्याच्या वर लाविला;
तो असा कीं, **हा यहूद्यांचा राजा येशू आहे.** ३८
नंतर त्यांनीं त्याजबरोबर दोन लुटारू, एक उजवीकडे व
एक डावीकडे, असे वधस्तंभावर खिळिले; ३९ आणि
जवळून जाणाऱ्यांनीं 'डोकीं हालवीत' त्याची अशी निंदा
केली कीं ४० अरे मंदिर मोडून तीन दिवसांत बांधणाऱ्या,
तूं आपला बचाव कर; तूं देवाचा पुत्र असलास तर
वधस्तंभावरून खालीं ये. ४१ तसेंच मुख्य याजकहि,
शास्त्री व वडील यांसहित थट्टा करीत म्हणाले कीं ४२
त्यानें दुसऱ्यांचें तारण केलें; त्याला आपला स्वतःचा
बचाव करवत नाहीं; तो इस्राएलांचा राजा आहे; त्यानें
आतां वधस्तंभावरून खालीं यावें, म्हणजे आम्ही त्याजवर
विश्वास ठेवूं; ४३ 'तो देवावर भरवसा ठेवितो; त्याला तो
प्रिय असला तर त्यानें त्याला आतां सोडवावें;' कारण मी
देवाचा पुत्र आहें असें तो म्हणाला. ४४ जे लुटारू
त्याच्याबरोबर वधस्तंभावर खिळिले होते त्यांनींहि त्याची
तशीच निंदा केली.

## येशूचा मृत्यु

४५ मग दोन प्रहरापासून तिसऱ्या प्रहरापर्यंत सर्व
देशावर अंधार पडला; ४६ आणि सुमारें तिसऱ्या प्रहरीं
येशू मोठ्यानें आरोळी मारून बोलला, 'एलोई, एलोई, लमा
सबक्तनी,' म्हणजे 'माझ्या देवा, माझ्या देवा, तूं माझा
कां त्याग केलास?' ४७ जे तेथें उभे होते त्यांच्यांतील
कित्येकांनीं हें ऐकून म्हटलें कीं तो एलीयाला बोलावितो.
४८ त्यांच्यांतून एकानें लागलेंच धावत जाऊन स्पंज
घेतला, आणि तो 'आंबेनें भरून वेतावर ठेवून' त्याला
'प्यावयास दिला.' ४९ बरकड म्हणाले, असूं दे; एलीया
त्याचा बचाव करावयास येतो कीं नाहीं हें आपण पाहूं.
५० मग येशूनें पुनः मोठ्यानें ओरडून प्राण सोडिला.
५१ तेव्हां, पाहा, पवित्रस्थानांतील पडदा वरपासून खालपर्यंत
फाटून दुभागला, भूमि कांपली, खडक फुटले, ५२ थडीं
उघडलीं, आणि निजलेल्या पवित्र जनांतील बहुत जणांचीं

शरीरें उठलीं; ५३ ते त्याच्या पुनरुत्थानानंतर थडग्यांतून
निघून पवित्र नगरांत गेले आणि बहुतांस दिसले. ५४
जमादार व त्याच्याबरोबर येशूची राखण करणारे हे,
भूमिकंप व घडलेल्या गोष्टी पाहून, अत्यंत भयभीत झाले,
व खरोखर हा देवाचा पुत्र होता, असे म्हणाले. ५५ तेथें
बहुत स्त्रिया, दुरून हें पाहत होत्या; त्या गालीलाहून
येशूची सेवा करीत त्याच्यामागें आल्या होत्या. ५६ त्यांज-
मध्यें मग्दालीया मरीया, याकोब व योसे यांची आई
मरीया, व जब्दीच्या पुत्रांची आई ह्या होत्या.

### येशूला खडकांत खोदिलेल्या कबरेंत ठेवतात

५७ मग संध्याकाळ झाल्यावर अरिमथाईंतील योसेफ
नांवाचा एक धनवान् मनुष्य आला, हाहि येशूचा शिष्य
होता; ५८ त्यानें पिलाताजवळ जाऊन येशूचें शरीर
मागितलें; तेव्हां पिलातानें तें द्यावयास आज्ञा केली. ५९
योसेफानें तें शरीर घेऊन तागाच्या स्वच्छ वस्त्रानें वेष्टिलें;
६० तें त्यानें खडकांत खोदलेल्या आपल्या नव्या कबरेंत
ठेविलें; एक मोठी धोंड लोटून ती कबरेच्या दाराला
लाविली आणि तो निघून गेला. ६१ तेथें कबरेसमोर
मग्दालीया मरीया व दुसरी मरीया ह्या बसल्या होत्या.

६२ दुसऱ्या दिवशीं म्हणजे तयारीनंतरच्या दिवशीं
मुख्य याजक व परूशी पिलाताकडे जमून म्हणाले, ६३
महाराज, तो ठक जीवंत असतां तीन दिवसांनंतर मी
उठेन, असें म्हणाला होता, याची आम्हांस आठवण आहे;
६४ म्हणून तिसऱ्या दिवसापर्यंत कबरेचा बंदोबस्त करा-
वयास सांगावें, नाहींतर कदाचित् त्याचे शिष्य रात्रीं
येऊन त्याला चोरून नेतील, व तो मेलेल्यांतून उठला
आहे, असें लोकांस सांगतील; मग शेवटली फसगत
पहिल्यापेक्षां वाईट होईल. ६५ पिलात त्यांस म्हणाला,
तुमच्याजवळ पहारा आहे; जा, तुमच्यानें होईल तसा
बंदोबस्त करा. ६६ मग पहारा बरोबर घेऊन ते गेले
आणि त्यांनीं धोंडीवर शिक्का मारून कबरेचा बंदोबस्त
केला.

### येशूचें पुनरुत्थान

२८ १ शब्बाथाच्या शेवटीं आठवड्याचा पहिला
दिवस उजाडतांच मग्दालीया मरीया व दुसरी
मरीया ह्या कबर पाहावयास आल्या. २ तेव्हां पाहा,
मोठा भूमिकंप झाला; कारण प्रभूच्या दूतानें स्वर्गां-
तून उतरून येऊन धोंड एकीकडे लोटली आणि तीवर तो
बसला. ३ त्याचें रूप विजेसारखें होतें व त्याचें वस्त्र
बर्फासारखें शुभ्र होतें. ४ त्याच्या भयानें पहारेकरी थरथर
कांपले व मृतप्राय झाले. ५ देवदूतानें त्या स्त्रियांस म्हटलें,
तुम्ही भिऊं नका; वधस्तंभावर खिळिलेला येशू याचा
शोध तुम्ही करितां, हें मला ठाऊक आहे. ६ तो येथें
नाहीं, कारण त्यानें सांगितल्याप्रमाणें तो उठला आहे. या,
प्रभु निजला होता तें हें स्थळ पाहा; ७ आणि लवकर
जाऊन त्याच्या शिष्यांस सांगा कीं तो मेलेल्यांतून उठला
आहे; पाहा, तो तुमच्यापूर्वी गालीलांत जात आहे, तेथें
तुम्ही त्याला पाहाल; पाहा, मीं तुम्हांस हें सांगितलें आहे.
८ तेव्हां त्या स्त्रिया भयभीत व अति हर्षित होऊन
कबरेपासून लवकर निघून त्याच्या शिष्यांस हें वर्तमान
सांगावयास धावत गेल्या. ९ मग पाहा, येशू त्यांस भेटून
म्हणाला, कल्याण असो. त्यांनीं जवळ जाऊन त्याचे चरण
धरून त्यास नमन केलें. १० तेव्हां येशूनें त्यांस म्हटलें,
भिऊं नका; जा, आणि हें माझ्या भावांस सांगा, यासाठीं
कीं त्यांनीं गालीलांत जावें, तेथें मी त्यांच्या दृष्टीस पडेन.

११ त्या जात असतां, पाहा, पहारेकऱ्यांतील कित्ये-
कांनीं नगरांत जाऊन झालेलें सर्व वर्तमान मुख्य याजकांस
सांगितलें. १२ तेव्हां त्यांनीं व वडिलांनीं मिळून मसलत
केली आणि शिपायांस पुष्कळ पैसे देऊन सांगितलें कीं १३
आम्ही झोपेंत असतां त्याच्या शिष्यांनीं रात्रीं येऊन त्याला
चोरून नेलें, असें म्हणा; १४ आणि ही गोष्ट सुभेदाराच्या
कानावर गेली तर आम्ही त्याचें मन वळवून तुम्हांस
निश्चिंत करूं. १५ मग त्यांनीं पैसे घेऊन शिकविल्याप्रमाणें
केलें; आणि ही गोष्ट यहूदी लोकांमध्यें पसरली, ती
आजपर्यंत चालू आहे.

### येशूची शेवटली आज्ञा व वचन

१६ इकडे अकरा शिष्य गालीलांत जो पर्वत येशूनें
नेमिला होता त्यावर गेले; १७ आणि त्यांनीं त्याला पाहून
नमन केलें, तरी कित्येकांस संशय वाटला. १८ तेव्हां
येशू जवळ येऊन त्यांस म्हणाला, स्वर्गांत आणि पृथ्वीवर

सर्व अधिकार मला दिला आहे; १९ यास्तव तुम्ही जाऊन
सर्व राष्ट्रांतील लोकांस शिष्य करा; त्यांस पित्याच्या,
पुत्राच्या व पवित्र आत्म्याच्या नामानें बाप्तिस्मा द्या. २०
जें सर्व कांहीं मीं तुम्हांस आज्ञापिलें तें पाळावयास त्यांस
शिकवा; आणि, पाहा, युगाच्या समाप्तीपर्यंत मी सदोदित
तुम्हांबरोबर आहें.

# मार्ककृत शुभवर्तमान



### बाप्तिस्मा करणारा योहान आणि त्याचा संदेश

१ १ देवाचा पुत्र येशू ख्रिस्त याच्या सुवार्तेचा प्रारंभ.
२ यशया संदेष्ट्याच्या ग्रंथांत लिहिलें आहे कीं,
पाहा, मी आपल्या दूताला तुझ्यापुढें पाठवितों;
तो तुझा मार्ग तयार करील;
३ अरण्यांत घोषणा करणाऱ्याची वाणी झाली,
ती अशी कीं, प्रभूचा मार्ग तयार करा,
त्याच्या वाटा नीट करा;
त्याप्रमाणें झालें. ४ पापांची क्षमा होण्यासाठीं पश्चात्तापाचा
बाप्तिस्मा गाजवीत बाप्तिस्मा देणारा योहान रानांत प्रगट
झाला. ५ तेव्हां सर्व यहूदीया देशांतील लोक व सर्व
यरुशलेमकर निघून त्याजकडे गेले आणि त्यांनीं आपलीं
पापें पदरीं घेऊन यार्देन नदींत त्याजपासून बाप्तिस्मा घेतला.
६ योहान उंटाच्या केसांचें वस्त्र पांघरीत असे, त्याच्या
कमरेस कातड्याचा कमरबंद असे आणि तो टोळ व रानमध
भक्षण करीत असे. ७ तो घोषणा करीत म्हणाला,
माझ्यामागून असा कोणी माझ्यापेक्षां समर्थ येत आहे कीं
त्याच्या वाहणांचा बंद लवून सोडावयास मी योग्य नाहीं.
८ मीं तुमचा बाप्तिस्मा पाण्यानें केला; तो तुमचा बाप्तिस्मा
पवित्र आत्म्यानें करील.

### येशूचा बाप्तिस्मा

९ त्या दिवसांत असें झालें कीं येशू गालीलांतील
नासरेथाहून येऊन योहानाच्या हातून यार्देनेंत बाप्तिस्मा
घेता झाला; १० आणि लागलेंच पाण्यांतून वर येतांना,
आकाश विदारलें आहे व आत्मा कबुतरासारखा आपणावर
उतरत आहे, असें त्यानें पाहिलें; ११ तेव्हां अशी
आकाशवाणी झाली कीं तूं माझा पुत्र, मला परमप्रिय
आहेस, तुजविषयीं मी संतुष्ट आहें.

### येशूची परीक्षा

१२ मग आत्म्यानें त्याला लागलेंच रानांत घालविलें;
१३ आणि सैतान त्याची परीक्षा करीत असतां तो अर-
ण्यांत चाळीस दिवस राहिला; तो वनपशूंमध्यें होता,
आणि देवदूतांनीं त्याची सेवा केली.

### येशू आपल्या कार्यास आरंभ करतो

१४ योहान धरला गेल्यावर येशू गालीलांत जाऊन
देवाच्या राज्याची सुवार्ता गाजवीत असें म्हणाला, १५
समय पूर्ण झाला आहे व देवाचें राज्य जवळ आलें आहे;
पश्चात्ताप करा, व सुवार्तेवर विश्वास ठेवा.

### प्रथम शिष्यांस पाचारण

१६ नंतर गालील समुद्राच्या कांठीं चालत असतां
त्यानें शिमोन व त्याचा भाऊ अंद्रिया यांस समुद्रांत जाळें
टाकीत असतां पाहिलें, कारण ते मासे धरणारे होते;
१७ येशूनें त्यांस म्हटलें, माझ्यामागें या, म्हणजे तुम्ही
मनुष्यें धरणारे व्हाल असें मी करीन. १८ मग ते तत्काळ
जाळीं सोडून त्याच्यामागें चालूं लागले. १९ नंतर तेथून
कांहींसें पुढें गेल्यावर त्यानें जब्दीचा पुत्र याकोब व त्याचा
भाऊ योहान यांस तारवांत जाळीं नीट करीत असतां
पाहिलें; २० आणि त्यानें त्यांस तत्काळ बोलाविलें; मग
ते आपला बाप जब्दी याला त्याच्या चाकरांजवळ तारवांत
सोडून त्याच्यामागें गेले.

### कफर्णहूमांत एका भूतग्रस्ताला येशू बरें करतो

२१ नंतर ते कफर्णहूमास गेले; आणि लागलेंच त्यानें

शब्बाथ दिवशीं सभास्थानांत जाऊन शिक्षण दिलें. २२
त्याच्या शिक्षणावरून लोक थक्क झाले, कारण शास्त्र्यां-
सारखें नव्हे तर अधिकारसंपन्न असल्यासारखें त्यानें त्यांस
शिक्षण दिलें. २३ तेव्हां त्यांच्या सभास्थानांत अशुद्ध
आत्मा लागलेला असा कोणी मनुष्य होता. २४ तो
ओरडून म्हणाला, हे येशू नासरेथकरा, आमचा तुमचा
काय संबंध ? आमचा नाश करावयास आलास काय ? तूं
कोण आहेस हें मला ठाऊक आहे, देवाचा पवित्र जन तो.
२५ येशूनें त्याला धमकावून म्हटलें, उगाच राहा व
याच्यांतून नीघ. २६ तेव्हां अशुद्ध आत्मा त्याला पिळून
टाकून मोठ्यानें ओरडून त्याच्यांतून निघून गेला. २७
तेव्हां ते सर्व थक्क झाले व एकमेकांस विचारूं लागले कीं हें
आहे तरी काय ? कशी ही नवीन शिकवण ! हा अशुद्ध
आत्म्यांसहि अधिकारानें आज्ञा करितो व ते त्याचें ऐकतात.
२८ ही त्याची कीर्ति लागलीच गालीलाच्या चहूंकडल्या
सर्व प्रांतांत पसरली.

### येशू पेत्राची सासू व इतर पुष्कळ जन यांस बरें करतो

२९ ते सभास्थानांतून निघाल्यावर लागलेच तो
याकोब व योहान यांजबरोबर शिमोन व अंद्रिया यांच्या
घरीं गेला. ३० शिमोनाची सासू तापानें पडली होती;
तिजविषयीं लागलेंच त्यांनीं त्याला सांगितलें; ३१ तेव्हां
त्यानें जवळ जाऊन तिचा हात धरून तिला उठविलें व तिचा
ताप तत्काळ निघाला, आणि ती त्यांची सेवा करूं लागली.
३२ संध्याकाळीं म्हणजे सूर्यास्त झाल्यावर लोकांनीं
सर्व दुखणाइतांस व भूतग्रस्तांस त्याजकडे आणिलें; ३३
आणि नगराचे सर्व लोक दाराशीं जमले. ३४ तेव्हां नाना
प्रकारच्या रोगांनीं पीडलेल्या अशा पुष्कळ्या मनुष्यांस
त्यानें बरें केलें व बहुत भूतांना घालविलें; त्या भूतांनीं
त्याला ओळखिलें, म्हणून त्यानें त्यांस बोलूं दिलें नाहीं.

### येशू प्रार्थनेसाठीं एकांतस्थळीं जातो व पुढें कफर्णहूम सोडतो

३५ मग तो सकाळीं मोठ्या पहाटेस उठून बाहेर गेला,
व अरण्यांत जाऊन त्यानें तेथें प्रार्थना केली. ३६ तेव्हां
शिमोन व त्याचे सोबती त्याचा शोध काढीत गेले. ३७
तो त्यांस सांपडल्यावर ते त्याला म्हणाले, सर्व लोक
आपला शोध करीत आहेत. ३८ तेव्हां त्यानें त्यांस
म्हटलें, जवळच्या मोठाल्या गांवांत मी उपदेश करावा
म्हणून आपण दुसरीकडे जाऊं, कारण याच करितां मी
निघालों. ३९ असा तो सर्व गालीलांतील त्यांच्या
सभास्थानांतून उपदेश करीत व भूतें काढीत फिरला.
४० तेव्हां कोणीएक कुष्ठरोगी त्याजकडे आला व
त्यांजपुढें गुडघे टेकून त्यानें त्याला अशी विनंति केली कीं
आपली इच्छा असली तर मला शुद्ध करावयास आपण
समर्थ आहां. ४१ तेव्हां त्याला त्याची करुणा आली
आणि त्यानें हात लांबवून त्याला स्पर्श केला व म्हटलें,
माझी इच्छा आहे, शुद्ध हो; ४२ तेव्हां त्याचें कुष्ठ तत्काळ
जाऊन तो शुद्ध झाला. ४३ मग त्यानें त्याला ताकीद
देऊन लागलेंच लावून दिलें, ४४ आणि सांगितलें कीं
पाहा, कोणाला कांहीं सांगूं नको; तर जाऊन आपणास
याजकाला दाखीव आणि त्यांस प्रमाण पटावें म्हणून
आपल्या शुद्धीकरणाकरितां मोशानें नेमिलेलें अर्पण कर;
४५ पण त्यानें या गोष्टीची पुष्कळ घोषणा करून अशी
प्रसिद्धि केली कीं येशूला उघडपणें नगरांत जाववेना;
म्हणून तो बाहेर अरण्यांत राहिला, तरी लोक चहूंकडून
त्याजकडे आले.

### येशू एका पक्षघाती मनुष्याला बरें करतो

२ १ कांहीं दिवसांनीं तो पुनः कफर्णहूमांत आला
आणि तो घरीं आहे असें लोकांच्या ऐकण्यांत
आलें. २ तेव्हां इतके लोक जमले कीं दाराच्या
आजूबाजूला देखील त्यांस जागा होईना; मग त्यानें
त्यांस संदेश दिला. ३ मग त्याजकडे एका पक्षघाती
मनुष्याला लोक घेऊन आले, त्यास चौघांनीं उचलून
आणिलें. ४ त्यांना दाटीमुळें त्याच्याजवळ जाववेना,
म्हणून त्यांनीं तो जेथें होता तेथलें छप्पर उस्तरुन
काढिलें आणि वाट करून तींतून ज्या बाजेवर पक्षघाती
निजला होता ती त्यांनीं खालीं सोडिली. ५ येशूनें त्यांचा
विश्वास पाहून पक्षघाती मनुष्याला म्हटलें, मुला, तुझ्या
पापांची क्षमा झाली आहे. ६ तेव्हां कित्येक शास्त्री तेथें
बसले होते ते आपल्या मनांत असा विचार करीत होते कीं

७ हा या प्रकारें कां बोलतो? हा दुर्भाषण करितो; एका-
वांचून म्हणजे देवावांचून, कोणाच्यानें पापांची क्षमा कर-
वते? ८ ते आपणांत असा विचार करीत आहेत हें येशूनें
आपल्या आत्म्यांत तत्काळ ओळखून त्यांस म्हटलें, तुम्ही
आपल्या मनांत हे विचार कां करितां? ९ तुझ्या पापांची
क्षमा झाली आहे, असें पक्षघाती मनुष्याला म्हणणें, किंवा
ऊठ, आपली बाज उचलून चाल, असें म्हणणें, यांतून
कोणतें सोपें? १० मनुष्याच्या पुत्राला पृथ्वीवर पापांची
क्षमा करावयास अधिकार आहे हें तुम्हांस समजावें
(म्हणून—तो पक्षघाती मनुष्याला म्हणतो) ११ मी तुला
सांगतों, ऊठ, आपली बाज उचलून घेऊन घरीं जा. १२
मग तो उठला व लागलाच आपली बाज उचलून सर्वांच्या
देखतां निघाला; यावरून सर्व थक्क झाले व देवाचें गौरव
करीत म्हणाले, आम्हीं असें कधीं पाहिलें नव्हतें.

### लेवीला पाचारण

१३ पुनः तो निघून समुद्रतीरीं गेला, आणि सर्व
लोकसमुदाय त्याच्याजवळ आला तेव्हां त्यानें त्यांस
शिक्षण दिलें. १४ नंतर जात असतांना त्यानें अल्फीचा
पुत्र लेवी याला जकातीच्या नाक्यावर बसलेलें पाहिलें,
व त्याला म्हटलें, माझ्यामागें ये; तेव्हां तो उठून
त्याच्यामागें गेला.

१५ नंतर असें झालें कीं तो त्याच्या घरीं जेवावयास
बसला, आणि बहुत जकातदार व पापी लोक हे येशू
व त्याचे शिष्य यांच्या पंक्तीस जेवावयास बसले; कारण
तेथें ते पुष्कळ असून त्याचे अनुयायी होते. १६ तेव्हां
परूश्यांतील शास्त्री यांनीं त्याला जकातदार व पापी लोक
यांच्याबरोबर जेवितांना पाहून त्याच्या शिष्यांस म्हटलें, हा
जकातदार व पापी लोक यांच्या बरोबर कां जेवितो?
१७ हें ऐकून येशू त्यांस म्हणाला, निरोग्यांस वैद्याची
गरज नाहीं, रोग्यांस आहे; मी धार्मिक जनांस नाहीं,
तर पापी जनांस बोलावावयास आलों आहें.

### उपासाचा प्रश्न

१८ तेव्हां योहानाचे शिष्य व परूशी उपास करीत
होते; ते येऊन त्यास म्हणाले, योहानाचे शिष्य व
परूश्यांचे शिष्य उपास करितात आणि आपले शिष्य
उपास कां करीत नाहींत? १९ येशूनें त्यांस म्हटलें,
वऱ्हाड्यांबरोबर वर आहे तोंपर्यंत त्यांना उपास करितां
येईल काय? जोंपर्यंत वर त्यांच्याबरोबर आहे तोंपर्यंत
त्यांना उपास करितां येत नाहीं. २० तरी असे दिवस
येतील कीं वर त्यांजपासून नेतला जाईल, तेव्हां ते त्या
दिवशीं उपास करितील. २१ कोणी कोऱ्या कापडाचा
तुकडा जुन्या वस्त्राला लावीत नाहीं; लाविला तर भर
भरण्याकरितां लावलेला तुकडा त्याला म्हणजे जुन्याला
फाडितो, आणि भोक मोठें होतें. २२ कोणी नवा द्राक्षा-
रस जुन्या बुधल्यांत घालीत नाहीं; घातला तर नव्या
द्राक्षारसानें बुधले फुटतात, द्राक्षारस सांडतो, व बुधलेहि
नासतात; म्हणून नवा द्राक्षारस नव्या बुधल्यांत घालतात.

### शब्बाथपालनाचा प्रश्न

२३ मग असें झालें कीं तो शब्बाथ दिवशीं शेतांमधून
जात असतां त्याचे शिष्य वाटेनें चालतांना कणसें मोडूं
लागले. २४ तेव्हां परूशी त्याला म्हणाले, पाहा, शब्बाथ
दिवशीं जें करूं नये तें हे कां करितात? २५ त्यानें त्यांस
म्हटलें, दाविदाला गरज पडली, म्हणजे त्याला व
त्याच्याबरोबर जे होते त्यांस भूक लागली, तेव्हां त्यानें
काय केलें; २६ अब्याथार प्रमुख याजक असतां तो
देवाच्या मंदिरांत कसा गेला व ज्या 'समर्पित भाकरी'
याजकांशिवाय कोणींहि खाऊं नयेत त्या त्यानें कशा खाल्ल्या,
व त्याजबरोबर जे होते त्यांस खावयास कशा दिल्या;
हें तुमच्या वाचण्यांत कधीं आलें नाहीं काय? २७
आणखी तो त्यांस म्हणाला, शब्बाथ मनुष्यासाठीं झाला,
मनुष्य शब्बाथासाठीं झाला नाहीं; २८ यास्तव मनुष्याचा
पुत्र शब्बाथाचाहि धनी आहे.

### लुल्या हाताच्या मनुष्यास बरें करणें

३ १ पुनः तो सभास्थानांत गेला; तेथें लळ्या हाताचा
एक मनुष्य होता; २ आणि त्याजवर दोष ठेवावा
म्हणून शब्बाथ दिवशीं तो त्याला बरें करील कीं काय, हें
पाहावयास ते टपून राहिले. ३ त्यानें लुल्या हाताच्या
मनुष्यास सांगितलें कीं मध्यें उभा राहा. ४ मग त्यानें त्यांस
म्हटलें, शब्बाथ दिवशीं बरें करणें किंवा वाईट करणें, जीव
वांचविणें किंवा मारणें, यांतून कोणतें उचित आहे?

पण ते उगेच राहिले. ५ मग त्यानें त्यांच्या मनाच्या
कठीणपणामुळें खिन्न होऊन त्या सर्वांकडे रागानें पाहिलें व
त्या मनुष्याला सांगितलें, आपला हात लांब कर; त्यानें
हात लांब केला आणि तो बरा झाला. ६ मग परूश्यांनीं
बाहेर जाऊन त्याचा घात कसा करावा याविषयीं
हेरोदीयांबरोबर त्याजविरुद्ध तावडतोब मसलत केली.

### इतर रोग्यांस बरें करणें

७ येशू आपल्या शिष्यांसह निघून समुद्राकडे गेला;
तेव्हां गालीलांतून मोठा मेळा मागें चालला; ८ आणि
यहूदीया, यरुशलेम, इदोम व यार्देनेच्या पलीकडचा प्रांत,
आणि सोर व सिदोन यांच्या आसमंतांतला प्रदेश, यांतून
मोठा मेळा तो जीं जीं मोठीं कृत्यें करीत होता त्यांविषयीं
ऐकून त्याजकडे आला. ९ तेव्हां दाटीमुळें चेंगरूं नये
म्हणून त्यानें आपल्या शिष्यांस एक होडी तयार ठेवण्यास
सांगितलें; १० कारण त्यानें बहुत जणांस बरें केलें, म्हणून
जे सर्व पीडलेले होते ते त्याला स्पर्श करावयास त्याच्या
अंगावर पडूं लागले. ११ जेव्हां जेव्हां अशुद्ध आत्मे
त्याला पाहत तेव्हां तेव्हां ते त्याच्या पायां पडून ओरडून
बोलत कीं तूं देवाचा पुत्र आहेस. १२ तेव्हां मला प्रगट
करूं नका असें त्यानें त्यांस पुष्कळ निक्षून सांगितलें.

### येशू आपल्या बारा प्रेषितांची निवड करतो

१३ मग डोंगरावर चढल्यावर त्याच्या मनाला वाटलें
त्यांस त्यानें बोलाविलें; व ते त्याजकडे आले. १४ तेव्हां
त्यानें बारा जणांस नेमिलें; अशासाठीं कीं त्यांनीं आपणा-
बरोबर असावें; आपण त्यांस उपदेश करावयास पाठवावें;
१५ आणि रोग बरे करण्याचा व भूतें काढण्याचा अधिकार
त्यांस असावा. १६ त्यानें शिमोन याला पेत्र हें उपनांव
दिलें; १७ जब्दीचा पुत्र याकोब व याकोबाचा भाऊ
योहान यांस बेनेरगेश म्हणजे गर्जनेचे पुत्र हें उपनांव
दिलें; १८ अंद्रिया, फिलिप्प, बर्थलमय, मत्तय, थोमा,
अल्फीचा पुत्र याकोब, तद्दय, शिमोन कनानी, १९ व
त्याला ( येशूला ) धरून देणारा यहूदा इस्कर्योत अशीं
त्यांचीं नांवें होतीं.

नंतर तो एका घरांत आला.

### सैतानाच्या साहाय्यानें येशू आपलीं कामें करतो या आरोपास त्यानें दिलेलें उत्तर

२० तेव्हां पुनः लोक इतके जमले कीं त्यांस भाकर
खावयासहि सवड मिळेना. २१ त्याचे आप्त हें ऐकून
त्याला धरावयास निघाले; कारण तो शुद्धीवर नाहीं असें ते
म्हणत होते. २२ तसेंच यरुशलेमाहून जे शास्त्री खालीं
आले होते ते म्हणत होते कीं त्याला बालजबूल लागला
आहे व तो भूतांच्या अधिकाऱ्याच्या साहाय्यानें भूतें
काढितो. २३ तेव्हां तो त्यांस आपणाजवळ बोलावून
दाखले देऊन बोलूं लागला कीं सैतान सैतानाला कसा
काढील ? २४ आपसांत फूट पडलेलें राज्य टिकत नाहीं;
२५ तसेंच आपसांत फूट पडलेलें घर टिकत नाहीं. २६
सैतान स्वतःवरच उठतो व त्यामध्यें फूट पडते तर तो
टिकत नाहीं, त्याचा शेवट होतो. २७ बळवान् मनुष्याला
बांधल्याशिवाय त्याच्या घरांत शिरून त्याचें जिन्नस
कोणाच्यानें लुटवत नाहींत; बांधल्यावर तो त्याचें घर
लुटील. २८ मी तुम्हांस खचीत सांगतों कीं मनुष्यांच्या
पुत्रांना सर्व पापें व जीं जीं दुर्भाषणें ते करितील, त्या
सर्वांची क्षमा होईल; २९ परंतु जो कोणी पवित्र
आत्म्याविरुद्ध दुर्भाषण करील त्याला क्षमा कधींहि होत
नाहीं, तर तो सर्वकाल राहणाऱ्या पापाचा दोषी आहे.
३० त्याला अशुद्ध आत्मा लागला आहे, असें ते म्हणत
होते म्हणून तो असें बोलला.

### खरें बंधुत्व

३१ तेव्हां त्याची आई व त्याचे भाऊ आले, आणि
त्यांनीं बाहेर उभें राहून निरोप पाठवून त्याला बोलाविलें
३२ त्याच्याभोंवतीं पुष्कळ लोक बसले होते; त्यांनीं त्याला
म्हटलें, पाहा, आपली आई व आपले भाऊ बाहेर आपला
शोध करीत आहेत. ३३ त्यानें त्यांस उत्तर दिलें, माझी
आई कोण व माझे भाऊ कोण ? ३४ मग जे
त्याच्याभोंवतीं बसले होते त्यांजकडे तो पाहून म्हणाला,
माझी आई व माझे भाऊ पाहा ! ३५ जो कोणी देवाच्या
इच्छेप्रमाणें वर्ततो तोच माझा भाऊ, बहीण व आई.

### पेरणी करणाऱ्याचा दृष्टांत

४
१ पुनः तो सरोवराच्या कांठीं शिक्षण देऊं

लागला, आणि त्याच्याजवळ लोकांचा एवढा मोठा
समुदाय जमला कीं तो सरोवरांत एका मचव्यावर चढून
बसला; आणि सर्व लोक सरोवराच्या कांठीं भूमीवर होते.
२ मग तो दाखले देऊन त्यांस पुष्कळ शिकवूं लागला
आणि आपल्या शिकवणींत त्यांस म्हणाला; ३ ऐका; पाहा,
एक पेरणारा पेरणी करावयास निघाला; ४ तो पेरीत
असतां असें झालें कीं कांहीं बीं वाटेवर पडलें, तें
पाखरांनीं येऊन खाऊन टाकिलें; ५ कांहीं खडकाळीवर
पडलें तेथें त्यास फारशी माती नव्हती; माती खोल
नसल्यामुळें तें लवकर उगवलें, ६ मग सूर्य उगवल्यावर
त्याला ऊन लागलें व त्याला मूळ नव्हतें म्हणून तें वाळून
गेलें. ७ कांहीं कांटेरी झाडांमध्यें पडलें, मग कांटेरी
झाडांनीं वाढून त्याची वाढ खुंटविली, म्हणून त्याला कांहीं
पीक आलें नाहीं. ८ कांहीं चांगल्या मातींत पडलें, तें
उगवून व मोठें होऊन त्याला पीक आलें; आणि त्याचें
तीसपट, साठपट, शंभरपट असें उत्पन्न झालें. ९ मग तो
म्हणाला, ज्याला ऐकावयास कान आहेत तो ऐको.

१० तो एकांतीं असतां त्याच्याबरोबर बारा जणांसह
जे होते त्यांनीं दाखल्याविषयीं त्याला विचारिलें. ११
त्यानें त्यांस म्हटलें, देवाच्या राज्याचें रहस्य समजून घेणें
हें तुम्हांला दिलें आहे; परंतु जे बाहेर आहेत त्यांचें
सर्व दाखल्यांनीं होतें; १२ यासाठीं कीं त्यांनीं 'पाहत
असतां पाहावें व त्यांस कळूं नये, आणि ऐकत असतां
ऐकावें व त्यांस उमजूं नये; त्यांनीं वळूं नये व त्यांना क्षमा
होऊं नये.' १३ तो त्यांस म्हणाला, हा दाखला तुम्ही
समजलां नाहीं काय? तर सर्व दाखले कसे समजाल?
१४ पेरणारा वचन पेरितो. १५ वाटेवर वचन पेरिलें
जातें तेथील लोक हे आहेत कीं त्यांनीं ऐकल्याबरोबर
सैतान येऊन त्यांत पेरलेलें वचन हिरावून घेतो. १६
तसेंच खडकाळीवर पेरलेले हे आहेत कीं ते वचन ऐकतांच
आनंदानें ग्रहण करितात; १७ तथापि त्यांमध्यें मूळ
नसल्यामुळें ते अल्पकाळ टिकतात; मग वचनामुळें संकट
किंवा छळ झाला म्हणजे ते लागलेच अडखळतात. १८
कांटेरी झाडांमध्यें पेरलेले हे आहेत कीं त्यांनीं वचन
ऐकल्यावर १९ संसाराची चिंता, द्रव्याचा मोह व इतर
विषयांचा लोभ हीं त्यांजमध्यें शिरून वचनाची वाढ
खुंटवितात आणि तें निष्फळ होतें. २० चांगल्या मातींत
पेरलेले हे आहेत कीं ते वचन ऐकून तें स्वीकारतात; मग
कोणी तीसपट, कोणी साठपट, कोणी शंभरपट असें पीक
देतात.

## दिवा व बीं यांचे दृष्टांत

२१ आणखी त्यानें त्यांस असें म्हटलें, दिवा मापा-
खालीं किंवा पलंगाखालीं ठेवावा म्हणून आणितात काय?
दिवठणीवर ठेवावा म्हणून आणितात कीं नाहीं? २२
प्रगट होणार नाहीं असें कांहीं गुप्त नाहीं, किंवा उघडें
होणार नाहीं असें कांहीं झाकलेलें नाहीं. २३ ज्या कोणाला
ऐकावयास कान आहेत तो ऐको. २४ आणखी त्यानें
त्यांस म्हटलें, तुम्ही जें ऐकतां त्याविषयीं सावध राहा.
ज्या मापानें तुम्ही माप घालतां त्याच मापानें तुमच्या
पदरीं घालतील, आणि तुम्हांस अधिकहि दिलें जाईल;
२५ कारण ज्याला आहे त्याला दिलें जाईल, व ज्याला
नाहीं त्याचें जें असेल तें देखील त्याजपासून काढून
घेतलें जाईल.

२६ आणखी त्यानें म्हटलें, देवाचें राज्य असें आहे
कीं जणूं काय एखाद्या मनुष्यानें बीं टाकल्यावर त्यानें रात्रीं
दिवसां निजावें उठावें, २७ आणि तें बीं रुजावें वाढावें;
पण त्याला कांहीं कळूं नये. २८ भूमि आपोआप पीक
देते; पहिल्यानें अंकुर, मग कणीस, मग कणसांत भरलेला
दाणा. २९ दाणा पिकल्यावर तो लागलाच 'विळा
घालतो, कारण कापणीची वेळ आली आहे.'

३० आणखी त्यानें म्हटलें, आपण देवाच्या राज्यास
कशाची उपमा द्यावी, अथवा कोणत्या दाखल्यानें तें
दर्शवावें? ३१ तें मोहरीच्या दाण्यासारखें आहे. तो
भूमींत पेरितांना जरी पृथ्वीवरील सर्व दाण्यांमध्यें बारीक
असतो, ३२ तरी पेरिल्यावर उगवून सर्व भाज्यांमध्यें
मोठा होतो आणि त्याला अशा मोठ्या फांद्या फुटतात कीं
'आकाशाच्या पाखरांस त्याच्या सावलींत वस्ती करितां
येते.'

३३ असे बहुत दाखले देऊन जसें त्यांच्यानें ऐकवलें
तसें त्यानें त्यांस वचन सांगितलें; ३४ आणि दाखल्या-

बोलून तो त्यांच्याबरोबर बोलला नाहीं; तरी एकांतीं
त्यानें आपल्या शिष्यांस सर्व गोष्टी फोडून सांगितल्या.

### येशू वावदळ शांत करतो

३५ त्याच दिवशीं संध्याकाळ झाल्यावर तो त्यांस
म्हणाला, आपण पलीकडे जाऊं. ३६ तेव्हां लोक-
समुदायाला सोडून देऊन तो मचव्यावर होता तसेंच ते
त्याला घेऊन गेले. त्याच्याबरोबर दुसरे मचवे होते. ३७
नंतर मोठें वावदळ झालें व लाटा मचव्यावर अशा उसळल्या
कीं तो भरूं लागला. ३८ तो वरामावर उशास घेऊन
निजला होता, तेव्हां ते त्याला उठवून म्हणाले, गुरुजी,
आपण बुडतों याची आपणाला चिंता नाहीं काय? ३९
तेव्हां त्यानें उठून वाऱ्याला दबाविलें, व समुद्राला म्हटलें,
उगा राहा, शांत हो. मग वारा पडला व अगदीं निवांत
झालें. ४० त्यावर त्यानें त्यांस म्हटलें, तुम्ही कां
घाबरलां? अद्यापि तुम्हांला विश्वास नाहीं काय? ४१
तेव्हां ते फार भ्याले व एकमेकांस म्हणूं लागले, हा आहे
तरी कोण? वारा व समुद्र हे देखील याचें ऐकतात.

### गरसेकरांच्या देशांतल्या भूतग्रस्तास बरें करणें

१ मग ते सरोवराच्या पलीकडे गरसेकरांच्या
५ देशांत आले; २ आणि तो मचव्यांतून उतरतांच
अशुद्ध आत्मा लागलेला असा एक मनुष्य कबरांतून
निघून त्याला भेटला. ३ तो कबरांत राहत असे व त्याला
सांखळ्यांनीं देखील आतां कोणाच्यानें बांधून आवरवेना.
४ कारण त्याला पुष्कळ वेळां बेड्यांनीं व सांखळ्यांनीं बांधिलें
असतांहि त्यानें सांखळ्या तोडून टाकिल्या, व बेड्यांचा
चुराडा केला, म्हणून कोणाच्यानें त्याला वश करवेना.
५ तो नेहमीं, रात्रंदिवस, कबरांमध्यें व डोंगरांमध्यें राहून
ओरडत असे व धोंड्यांनीं आपलें अंग ठेचून घेत असे.
६ तो येशूला दुरून पाहून धावून आला व त्याच्या पायां
पडला; ७ आणि मोठ्यानें ओरडून बोलला, हे येशू,
परात्पर देवाच्या पुत्रा, तुझा माझा काय संबंध? मला
पीडिशील तर तुला देवाची शपथ. ८ कारण त्यानें त्याला
म्हटलें होतें, अरे अशुद्ध आत्म्या, या मनुष्यांतून नीघ.
९ त्यानें त्याला विचारिलें, तुझें नांव काय? त्यानें उत्तर
दिलें, माझें नांव सैन्य; कारण आम्ही पुष्कळ आहों; १०
आणि आम्हांस या देशांतून घालवूं नको, अशी त्यानें
त्याला फार विनवणी केली. ११ तेथें डोंगराकडे डुकरांचा
मोठा कळप चरत होता. १२ तेव्हां भूतांनीं त्याला विनंति
केली कीं आम्हीं त्या डुकरांमध्यें शिरावें म्हणून त्यांजकडे
आम्हांस लावून दे. १३ मग त्यानें त्यांस परवानगी दिली;
मग ते अशुद्ध आत्मे निघून त्या डुकरांत शिरले, आणि
तो कळप धडक धावत जाऊन कड्यावरून सरोवरांत
पडला व तीं सरोवरांत गुदमरून मेलीं; तीं सुमारें दोन
हजार होतीं. १४ मग डुकरें चारणाऱ्यांनीं पळत जाऊन
नगरांत व शेतांमळ्यांत हें वर्तमान सांगितलें. तेव्हां काय
झालें तें पाहावयास लोक आले. १५ ते येशूजवळ
आल्यावर त्यांनीं भूतग्रस्ताला, म्हणजे ज्यांत सैन्य होतें
त्याला, वस्त्र पांघरलेलें व शुद्धीवर आलेलें असें पाहिलें;
आणि त्यांस भीति वाटली. १६ हें ज्यांनीं पाहिलें होतें
त्यांनीं भूतग्रस्ताविषयींची व डुकरांविषयींची हकीकत
त्यांस सांगितली. १७ तेव्हां तुम्ही आमच्या प्रांतांतून
निघून जा अशी ते त्याची विनवणी करूं लागले. १८
मग तो तारवांत बसतांच, जो अगोदर भूतग्रस्त होता
त्यानें मला आपल्याजवळ राहूं द्यावें अशी त्याला विनंति
केली; १९ परंतु त्यानें त्याला येऊं दिलें नाहीं, तर त्याला
म्हटलें, तूं आपल्या घरीं स्वकीयांकडे जा, व प्रभूनें
तुजवर दया करून तुजसाठीं केवढीं मोठीं कार्यें केलीं
हें त्यांस सांग. २० तेव्हां तो निघाला, आणि जीं मोठीं
कार्यें येशूनें त्याजसाठीं केलीं होतीं तीं दकापलीस येथें
प्रसिद्ध करूं लागला; तेव्हां सर्वांस आश्चर्य वाटलें.

### याइराच्या कन्येस जीवंत करणें व रक्तस्रावी बाईस बरें करणें

२१ मग येशू मचव्यांत बसून पलीकडे परत गेल्यावर
त्याजवळ लोकांचा मोठा समुदाय जमला; तेव्हां तो
सरोवराजवळ होता. २२ मग याईर नामें एक सभा-
स्थानाचा अधिकारी आला व त्याला पाहून त्याच्या पायां
पडला. २३ त्यानें त्याला फार विनवणी केली कीं माझी
लहान कन्या मरणपंथास टेकली आहे; ती बरी होऊन
वांचावी म्हणून आपण येऊन तिजवर हात ठेवावे. २४
मग तो त्याच्याबरोबर गेला; तेव्हां लोकांचा मोठा समुदाय

त्याच्यामागून चालला व त्यांनीं त्याच्याभोंवतीं गर्दी केली.
२५ तेव्हां बारा वर्षें रक्तस्राव होत असलेली एक स्त्री
होती; २६ तिनें बहुत वैद्यांच्या हातून पुष्कळ दुःख
सोसून आपल्याजवळ होतेंनव्हतें तें सर्व खर्चिलें होतें;
तरी बरी न होतां तिचा रोग अधिक झाला होता; २७
ती येशूविषयींच्या गोष्टी ऐकून त्या गर्दीत शिरली, आणि
त्याच्यामागें येऊन त्याच्या वस्त्राला शिवली. २८ तिनें
म्हटलें, मी केवळ याच्या वस्त्राला शिवलें तरी बरी
होईन. २९ तेव्हां लागलाच तिचा रक्ताचा झरा सुकून
गेला व आपण त्या पीडेपासून बरें झालों आहों असा
तिला शरीरांत अनुभव आला; ३० येशूनें आपणांतील
शक्ति निघाली हें तत्क्षणीं आपल्या ठायीं ओळखून
गर्दीमध्यें वळून म्हटलें, माझ्या वस्त्रांस कोणीं स्पर्श केला?
३१ त्याचे शिष्य त्याला म्हणाले, लोकसमुदाय आपल्या-
भोंवतीं गर्दी करीत आहे हें आपण पाहतां, आणि मला
कोणीं स्पर्श केला हें कसें म्हणतां? ३२ मग जिनें हें केलें
तिला पाहावयास त्यानें सभोंवार नजर फेकली. ३३ तेव्हां
ती स्त्री, आपणाकरितां जें कांहीं करण्यांत आलें होतें तें
लक्षांत आणून भीत भीत व कांपत कांपत त्याजकडे
आली, व त्याच्या पायां पडून तिनें त्याला सर्व वृत्तांत
खरा खरा सांगितला. ३४ त्यानें तिला म्हटलें, मुली,
तुझ्या विश्वासानें तुला बरें केलें आहे; सुखरूप जा,
आणि आपल्या पीडेपासून मुक्त ऐस.

३५ तो हें बोलत आहे इतक्यांत सभास्थानाच्या
अधिकाऱ्याच्या येथून कोणीं येऊन त्याला सांगितलें कीं
तुमची कन्या मरण पावली, गुरुजीला आणखी श्रम
कशाला देतां? ३६ परंतु येशू, सांगितलेल्या वर्तमानाकडे
लक्ष न देतां, सभास्थानाच्या अधिकाऱ्याला म्हणाला,
भिऊं नको, विश्वास मात्र धर. ३७ त्यानें आपणाबरोबर पेत्र,
याकोब व याकोबाचा भाऊ योहान यांच्याशिवाय कोणाला
येऊं दिलें नाहीं. ३८ मग ते सभास्थानाच्या
अधिकाऱ्याच्या घरीं आल्यावर अतिशय रडणारे व
आकांत करणारे यांचा गलबला चाललेला त्यानें पाहिला.
३९ तो आंत जाऊन त्यांस म्हणाला, तुम्ही कशाला
गलबला करितां व रडतां? मूल मेलें नाहीं, झोपेंत आहे.
४० तेव्हां त्यांनीं त्याचा उपहास केला; पण त्या सर्वांस
बाहेर घालवून मुलाचा बाप व आई आणि आपल्या-
बरोबरचे इसम यांस घेऊन मूल होतें तेथें तो आंत गेला.
४१ नंतर बालिकेचा हात धरून तो म्हणाला, तलीथा
कूम्; याचा अर्थ, मुली, मी तुला सांगतों, ऊठ. ४२
आणि लागलीच ती मुलगी उठून चालूं लागली. ती बारा
वर्षांची होती. तेव्हां ते लागलेच अत्यंत विस्मित झाले.
४३ हें कोणाला कळूं नये म्हणून जपा, अशी त्यानें त्यांस
निक्षून आज्ञा केली, आणि तिला कांहीं खावयाला
द्यावयास सांगितलें.

## नासरेथकर येशूचा नाकार करतात

६
१ नंतर तो तेथून निघून स्वदेशीं आला, व त्याचे
शिष्य त्याच्यामागें आले. २ मग शब्बाथ दिवशीं तो
सभास्थानांत शिकवूं लागला, आणि पुष्कळ लोक
त्याचें ऐकून थक्क होऊन बोलले, याला हें सर्व कोठून
प्राप्त झालें? याला काय ही बुद्धि देण्यांत आली आहे आणि
याच्या हातून केवढे हे पराक्रम होतात? ३ जो सुतार,
मरीयेचा पुत्र, आणि याकोब, योसे, यहूदा व शिमोन यांचा
भाऊ तो हाच आहे ना? आणि याच्या बहिणी येथें
आपणांबरोबर आहेत ना? असे ते त्याजविषयीं अडखळले.
४ येशू त्यांस म्हणाला, संदेष्टा आपला देश, आपले नात-
लग व आपलें घर यांत मात्र सन्मान पावत नाहीं. ५
त्यानें थोड्याशा रोग्यांवर हात ठेवून त्यांस बरें केलें,
याशिवाय दुसरा कोणताहि पराक्रम तेथें त्यास करितां आला
नाहीं. ६ त्यांच्या अविश्वासामुळें त्याला आश्चर्य वाटलें.
तेव्हां तो शिक्षण देत गांवोगांव फिरला.

## बारा प्रेषितांना कामगिरीवर पाठविणें

७ नंतर तो बारा जणांस बोलावून त्यांस दोघे दोघे
असे पाठवूं लागला; त्यानें त्यांस अशुद्ध आत्म्यांवरचा
अधिकार दिला; ८ आणि त्यांस आज्ञा केली कीं वाटे-
साठीं काठीवांचून दुसरें कांहीं घेऊं नका; भाकरी, झोळणा,
किंवा कमरकशांत पैसे घेऊं नका; ९ तरी वहाणा घालून
चाला; दोन अंगरखे घालूं नका. १० आणखी त्यानें त्यांस
असें सांगितलें कीं तुम्ही कोठेंहि एकाद्या घरांत राहण्यास
जाल तेथेंच, त्या ठिकाणांतून निघाल तोंपर्यंत राहा; ११

आणि ज्या ठिकाणचे लोक तुमचा स्वीकार करणार नाहींत
व तुमचें ऐकणार नाहींत त्यांस साक्ष व्हावी म्हणून तुम्ही
तेथून निघतांना आपल्या तळपायांची धूळ तेथेंच झाडून
टाका. १२ त्यांनीं तेथून जाऊन, लोकांनीं पश्चात्ताप करावा
अशी घोषणा केली; १३ पुष्कळ भूतें काढलीं आणि बहुत
रोग्यांस तैलाभ्यंग करून बरें केलें.

### बाप्तिस्मा करणाऱ्या योहानाचा मृत्यु

१४ त्याजविषयीं हेरोद राजानें ऐकलें, (कारण त्याचें
नांव प्रसिद्ध झालें होतें,) आणि म्हटलें, बाप्तिस्मा करणारा
योहान मेलेल्यांतून उठला आहे, म्हणून त्याच्या ठायीं हे
पराक्रम होत आहेत. १५ कोणी म्हणाले, हा एलीया आहे;
दुसरे म्हणाले हा संदेष्टा, म्हणजे संदेष्ट्यांपैकीं कोणीएक
आहे; १६ परंतु हें ऐकून हेरोद म्हणाला, ज्या योहानाचा
मीं शिरच्छेद करविला तो हा योहान उठला आहे. १७
हेरोदानें स्वतः माणसें पाठवून आपला भाऊ फिलिप्प याची
बायको हेरोदिया इच्यासाठीं योहानाला धरून बंदिशाळेंत
जखडून ठेविलें होतें; कारण हेरोदानें तिजबरोबर लग्न केलें
होतें; १८ व योहानानें त्याला म्हटलें होतें, तूं आपल्या
भावाची बायको ठेवावी हें तुला विहित नाहीं. १९
याकरितां हेरोदिया त्याच्याशीं द्वेषभाव धरून त्याचा वध
करावयास पाहत होती, परंतु तिचें कांहीं चालेना; २०
कारण योहान धार्मिक व पवित्र पुरुष आहे हें ओळखून,
हेरोद त्याचें भय धरीत व त्याचें संरक्षण करीत असे; तो
त्याचें ऐकून फार गोंधळांत पडत असे; तरी हर्षानें त्याचें
ऐकून घेत असे. २१ नंतर एक सोईचा दिवस आला, तेव्हां
हेरोदानें आपल्या जन्मदिवसाच्या उत्साहांत आपले प्रधान,
सरदार व गालीलांतील प्रमुख लोक यांस मेजवानी केली;
२२ आणि हेरोदियेच्या कन्येनें स्वतः आंत जाऊन व
नाच करून हेरोदास व त्याच्याबरोबर भोजनास बसलेल्यांस
खुश केलें; तेव्हां राजानें त्या मुलीला म्हटलें, तुला जें
कांहीं पाहिजे तें माझ्याजवळ माग, म्हणजे मी तुला देईन.
२३ तो तिला शपथ वाहून म्हणाला कीं माझ्या अर्ध्या
राज्यापर्यंत जें कांहीं तूं माझ्याजवळ मागशील तें मी तुला
देईन. २४ तेव्हां ती बाहेर जाऊन आपल्या आईला
म्हणाली, मी काय मागूं? ती म्हणाली, बाप्तिस्मा करणारा
योहान याचें शीर माग. २५ तेव्हां लागलेंच तिनें घाईनें
आंत राजाकडे येऊन म्हटलें कीं, बाप्तिस्मा करणारा योहान
याचें शीर तबकांत घालून आतांच मला द्यावें अशी माझी
इच्छा आहे. २६ तेव्हां राजा अति खिन्न झाला; तथापि
शपथांमुळें व भोजनास बसलेल्या लोकांमुळें त्याच्यानें तिला
नाहीं म्हणवेना. २७ राजानें लागलेंच आपल्या पहारे-
कऱ्यांतील एका शिपायास पाठवून त्याचें शीर आणावयास
आज्ञा केली; त्यानें बंदिशाळेंत जाऊन त्याचा शिरच्छेद
केला; २८ आणि शीर तबकांत घालून आणून मुलीला
दिलें; मुलीनें तें आपल्या आईला दिलें. २९ हें ऐकून
त्याचे शिष्य आले आणि त्यांनीं त्याचें शरीर उचलून
नेऊन कबरेंत ठेविलें.

### प्रेषितांचें परत येणें

३० मग प्रेषितांनीं येशूजवळ जमा होऊन आपण जें
जें केलें व शिकविलें तें तें सर्व सांगितलें. ३१ तो त्यांस
म्हणाला, अरण्यस्थलीं एकांतीं चला व थोडा विसावा घ्या;
कारण तेथें पुष्कळ लोक येतजात असल्यामुळें त्यांस जेवा-
वयास देखील अवकाश मिळेना. ३२ तेव्हां ते मचव्यांत
बसून अरण्यस्थलीं एकांतीं गेले. ३३ लोकांनीं त्यांस निघतां
पाहिलें व बहुतांनीं ओळखलें; आणि तेथल्या सर्व नगरांतून
लोक पायींच येऊन तिकडे धावत जाऊन त्यांच्या अगोदर
पोंचले. ३४ तेव्हां येशूनें बाहेर येऊन लोकांचा मोठा
समुदाय पाहिला; 'ज्या मेंढरांस मेंढपाळ नाहीं त्यांच्या-
सारखे' ते होते म्हणून त्याला त्यांचा कळवळा आला,
आणि तो त्यांस बहुत गोष्टी शिकवूं लागला.

### येशू पांच हजारांना जेवूं घालतो

३५ दिवस फार उतरल्यावर त्याचे शिष्य त्याजकडे
येऊन म्हणाले, ही जागा रान आहे व आतां दिवस फार
उतरला आहे; ३६ लोकांनीं भोवतालच्या खेड्यापाड्यांत
जाऊन आपणांकरितां खाण्यास कांहीं विकत घ्यावें म्हणून
त्यांस निरोप द्या. ३७ त्यानें त्यांस उत्तर दिलें कीं तुम्ही
त्यांस खावयास द्या. ते त्याला म्हणाले, आम्हीं जाऊन
पन्नास रुपयांच्या भाकरी विकत घेऊन त्यांस खावयाला
द्याव्या काय? ३८ तो त्यांस म्हणाला, तुम्हांजवळ किती
भाकरी आहेत? जाऊन पाहा. पाहिल्यावर ते म्हणाले,

पांच व दोन मासे. ३९ नंतर त्या सर्वांनीं हिरव्या
गवतावर पंक्तिपंक्तीनें बसावें म्हणून त्यानें त्यांस सांगितलें.
४० तेव्हां ते शंभरशंभर व पन्नासपन्नास पंक्तिपंक्तीनें जसे
काय वाफे असे बसले. ४१ मग त्यानें त्या पांच भाकरी
व ते दोन मासे घेऊन वर स्वर्गाकडे पाहून आशीर्वाद
दिला आणि भाकरी मोडून त्या त्यांना वाढावयास आपल्या
शिष्यांजवळ दिल्या; आणि ते दोन मासे त्या सर्वांस वांटून
दिले; ४२ मग सर्व जण जेवून तृप्त झाले. ४३ आणि
त्यांनीं बारा टोपल्या तुकडे उचलून नेले व माशांचेहि नेले.
४४ भाकरी खाणाऱ्या मंडळींत पांच हजार पुरुष होते.

### येशू पाण्यावरून चालतो

४५ नंतर, मी लोकसमुदायास निरोप देतों आणि
तुम्ही मचव्यांत बसून पलीकडे बेथसैदा येथें जा, असें
म्हणून त्यानें लागलेंच शिष्यांस लावून दिलें. ४६ मग
त्यांस निरोप देऊन तो प्रार्थना करावयास डोंगरावर गेला;
४७ आणि रात्र झाली तेव्हां तो मचवा समुद्राच्या
मध्यभागीं होता, व तो एकटाच जमिनीवर होता. ४८
त्यानें त्यांस वल्हीं मारितां मारितां हैराण झालेले पाहिलें;
कारण वारा तोंडचा होता. नंतर सुमारें रात्रीच्या चवथ्या
प्रहरीं तो समुद्रावरून चालत त्यांजकडे आला; व
त्यांच्याजवळून पुढें जाण्याच्या बेतांत होता; ४९ पण ते
त्याला समुद्रावरून चालतां पाहून, हें भूत आहे असें
समजून, ओरडूं लागले; ५० कारण ते सर्व त्याला
पाहून घाबरून गेले. तेव्हां तो लागलाच त्यांबरोबर बोलूं
लागला व त्यांस म्हणाला, धीर धरा; मी आहें; भिऊं नका.
५१ आणि तो त्यांच्याकडे मचव्यावर चढून गेला; तेव्हां
वारा पडला; मग ते मनांतल्या मनांत फार आश्चर्यचकित
झाले. ५२ कारण भाकरीची गोष्ट त्यांच्या ध्यानांत आली
नव्हती, त्यांचें अंतःकरण कठीण झालें होतें.

### गनेसरेत येथें रोग्यांस बरें करणें

५३ नंतर ते पार जाऊन गनेसरेताच्या किनाऱ्यास
पोहोंचले व त्यांनीं मचवा बांधून ठेविला. ५४ ते
मचव्यांतून उतरले तेव्हांच लोकांनीं त्याला ओळखिलें;
५५ मग ते चोहोंकडे त्या अवघ्या प्रांतांत धावत फिरले.
आणि जीं मनुष्यें दुखणेकरी होतीं त्यांस बाजेवर घालून
जेथें कोठें तो आहे म्हणून त्यांच्या कानीं येई तेथें तेथें
नेऊं लागले. ५६ तो गांवांत, नगरांत किंवा खेड्यांत
कोठेंहि जाई तेथें ते दुखणेकऱ्यांस बाजारांत नेऊन ठेवीत
आणि आपल्या वस्त्राच्या गोंड्याला मात्र स्पर्श करूं द्या
अशी त्याच्याजवळ विनंति करीत; आणि जितक्यांनीं
त्याला स्पर्श केला तितके बरे झाले.

### संप्रदायांची अनास्था होते या टीकेस येशूनें दिलेलें उत्तर

७ १ मग परूशी व कित्येक शास्त्री यरुशलेमाहून
येऊन त्याजवळ एकत्र जमले. २ त्यांनीं त्याच्या
कितीएक शिष्यांस अशुद्ध म्हणजे न धुतलेल्या हातांनीं
भाकरी खातां पाहिलें होतें. ३ परूशी व सर्व यहूदी
वडिलांच्या संप्रदायास अनुसरून हात नीट धुतल्यावांचून
जेवीत नाहींत; ४ बाजारांतून आल्यावर स्नान केल्या-
वांचून जेवीत नाहींत; आणि प्याले, घागरी, पितळेचीं
भांडीं यांचें धुणें, व असे बहुत दुसरे नियम त्यांनीं
स्वीकारले आहेत. ५ यावरून परूश्यांनीं व शास्त्र्यांनीं
त्याला विचारिलें कीं आपले शिष्य अशुद्ध हातांनीं भाकरी
खातात, ते वडिलांच्या संप्रदायाप्रमाणें कां चालत नाहींत ?
६ त्यानें त्यास उत्तर दिलें कीं तुम्हां ढोंग्यांविषयीं यशयानें
चांगलाच संदेश दिला; त्याचा लेख असा आहे कीं

हे लोक ओठांनीं माझा सन्मान करितात,
परंतु त्यांचें अंतःकरण मजपासून दूर आहे.
७ हे मनुष्यांचे नियम, शास्त्र म्हणून शिकवून
व्यर्थ माझी उपासना करितात.

८ तुम्ही देवाची आज्ञा सोडून मनुष्यांचा संप्रदाय
अनुसरतां. ९ आणखी तो त्यांस म्हणाला, तुम्ही आपल्या
संप्रदायाचें अनुसरण करण्याकरितां देवाच्या आज्ञेचा
अगदीं त्याग करितां. १० 'तूं आपला बाप व आपली
आई यांचा मान राख,' आणि 'जो बापाचीं किंवा आईची
निंदा करितो त्याला देहांतशिक्षा व्हावी' असें मोशानें
सांगितलें; ११ परंतु तुम्ही म्हणतां, कोणी बापाला अथवा
आईला म्हणेल कीं जेणेंकरून तुझें हित मजकडून झालें
असतें तें कुर्बान म्हणजे अर्पण आहे, १२ तर त्याला
त्यापुढें आपल्या बापासाठीं किंवा आईसाठीं तुम्ही कांहीं

करूं देत नाहीं; १३ या प्रकारें तुम्हीं आपल्या चालू
ठेवलेल्या संप्रदायानें देवाचें वचन रद्द करितां आणि
यासारख्या इतर पुष्कळ गोष्टी करितां.
१४ तेव्हां त्यानें लोकसमुदायाला पुनः बोलावून
म्हटलें, तुम्ही सर्व माझें ऐका व समजून घ्या; १५ मनु-
ष्याच्या बाहेरून त्याच्यांत गेलें असतां त्याला अपवित्र
करील असें कांहीं नाहीं, तर मनुष्याच्या आंतून जें निघतें
तेंच मनुष्याला अपवित्र करितें. [ १६ ज्या कोणाला ऐका-
वयास कान आहेत तो ऐको. ] १७ तो लोकसमुदायाला
सोडून घरांत गेल्यावर त्याच्या शिष्यांनीं त्याला त्या
दाखल्याविषयीं विचारिलें. १८ तेव्हां तो त्यांस म्हणाला,
तुम्ही देखील इतके अज्ञानी आहां काय ? जें कांहीं बाहेरून
मनुष्याच्या आंत जातें त्याच्यानें त्याला अपवित्र करवत
नाहीं, हें तुम्ही समजत नाहीं काय ? १९ कारण तें त्याच्या
अंतःकरणांत जात नाहीं, तर त्याच्या पोटांत जातें व
शौचकूपांत बाहेर पडतें. अशा प्रकारें त्यानें सर्व अन्न
शुद्ध ठरविलें. २० आणखी तो म्हणाला, जें मनुष्यांतून
बाहेर निघतें तेंच मनुष्याला अपवित्र करितें. २१ कारण
आंतून म्हणजे मनुष्याच्या अंतःकरणांतून दुष्ट विचार
निघतात; २२ जारकर्में, चोऱ्या, खून, व्यभिचार, लोभ,
दुष्टपणा, कपट, कामातुरपणा, दुष्टदृष्टि, शिव्यागाळी, गर्व,
मूर्खपणा, २३ या सर्व वाईट गोष्टी आंतून बाहेर निघतात
व मनुष्याला अपवित्र करितात.

## एका यहुदीतर मुलीचें रोगनिवारण

२४ मग तो तेथून उठून सोर याच्या सीमेवरील
प्रांतांत गेला. तेथें तो एका घरांत गेला; हें कोणास कळूं
नये असें त्याच्या मनांत होतें, तरी त्याला गुप्त राहणें
शक्य नव्हतें. २५ इतक्यांत जिच्या लहान कन्येस अशुद्ध
आत्मा लागला होता अशा कोणीएका स्त्रीनें त्याजविषयीं
ऐकलें व ती त्याच्याजवळ येऊन त्यच्या पायां पडली. २६
ती बायको हेल्लेणी असून जातीची सुरफुनीकी होती.
आपल्या कन्येंतून भूत काढावें, अशी तिनें त्याला विनंति
केली. २७ तो तिला म्हणाला, मुलांना प्रथम तृप्त होऊं दे,
कारण मुलांची भाकरी घेऊन कुत्र्यांस टाकणें ठीक नाहीं.
२८ मग तिनें त्याला उत्तर दिलें, खरें आहे, प्रभू, तरी
कुत्रींहि मेजाखालीं मुलांच्या हातून पडलेला चाराचुरा
खातात. २९ तेव्हां त्यानें तिला म्हटलें, या बोलण्यामुळें
जा; तुझ्या कन्येंतून भूत निघून गेलें आहे. ३० मग ती
आपल्या घरीं गेली, तों कन्या अंथरुणावर निजलेली व
भूत निघून गेलें आहे असें तिच्या दृष्टीस पडलें.

## एका बहिऱ्या–मुक्या मनुष्याला बरें करणें

३१ नंतर तो सोराच्या सीमेवरील प्रांतांतून निघाला
आणि सिदोनावरून, दकापलीसाच्या सीमेवरील प्रांतांमधून,
गालील समुद्राकडे परत आला. ३२ तेव्हां लोकांनीं एका
बहिऱ्या–तोत्र्या मनुष्याला त्याजकडे आणून, आपण
याजवर हात ठेवावा अशी त्याला विनंति केली. ३३
तेव्हां त्यानें त्याला लोकसमुदायापासून एकीकडे नेऊन
त्याच्या कानांत बोटें घातलीं व थुंकून त्याच्या जिभेला
स्पर्श केला; ३४ आणि वर स्वर्गाकडे पाहून त्यानें उसासा
टाकिला व म्हटलें, इप्फाता, म्हणजे मोकळा हो. ३५
तेव्हां त्याचे कान मोकळे झाले व त्याच्या जिभेचा बंद
सुटून तो स्पष्ट बोलूं लागला. ३६ तेव्हां हें कोणाला
कळवूं नका असें त्यानें त्यांस निक्षून सांगितलें; परंतु तो
त्यांस जसजसें सांगत गेला तसतसें ते अधिकच हें
गाजवीत गेले; ३७ आणि ते अतिशय थक्क होऊन बोलले
कीं यानें सर्व कांहीं चांगलें केलें; बहिऱ्यांस ऐकणारे व
मुक्यांस बोलणारे असें हा करितो.

## येशू चार हजारांना जेवूं घालतो

८ १ त्या काळीं पुनः लोकसमुदाय फार मोठा जमला
होता, व त्यांच्याजवळ खावयास कांहीं नव्हतें,
म्हणून त्यानें आपल्या शिष्यांस बोलावून त्यांस म्हटलें,
२ मला लोकसमुदायाचा कळवळा येतो, कारण आज
तीन दिवस ते माझ्याजवळ राहिले आहेत, व त्यांच्या-
जवळ खावयास कांहीं नाहीं; ३ आणि मी त्यांस उपाशी
घरीं लावून दिलें तर ते वाटेंत कासावीस होतील; त्यांतील
कित्येक तर लांबून आलेले आहेत. ४ त्याच्या शिष्यांनीं
त्याला उत्तर दिलें कीं येथें रानांत यांच्यासाठीं भाकरी
कोठून आणाव्या व यांना कोणीं तृप्त करावें ? ५ त्यानें
त्यांस विचारिलें, तुम्हांजवळ किती भाकरी आहेत ? ते

म्हणाले, सात. ६ नंतर त्यानें लोकसमुदायाला भूमीवर बसावयास सांगितलें; त्या सात भाकरी घेऊन व ईशोपकारस्मरण करून त्यानें त्या मोडिल्या आणि त्यांस वाढण्याकरितां त्या आपल्या शिष्यांजवळ दिल्या; मग त्यांनीं लोकसमुदायाला वाढिल्या. ७ त्यांजवळ थोडे लहान मासे होते; त्यांस त्यानें आशीर्वाद देऊन तेहि त्यांना वाढावयास सांगितलें. ८ ते जेवून तृप्त झाल्यावर जे तुकडे उरले होते त्यांच्या त्यांनीं सात पाट्या उचलून नेल्या. ९ तेथें सुमारें चार हजार लोक होते; मग त्यानें त्यांस निरोप दिला. १० नंतर तो लागलाच आपल्या शिष्यांसुद्धां मचव्यांत बसून दल्मनुथा प्रांतांत आला.

### असमंजसपणाबद्दल येशू शिष्यांचा निषेध करतो

११ मग परूशी येऊन त्याजबरोबर विवाद करूं लागले, आणि त्याची परीक्षा पाहण्याकरितां त्यांनीं त्याच्याजवळ आकाशांतून चिन्ह मागितलें. १२ तेव्हां तो आपल्या आत्म्यांत फार कण्हून म्हणाला, ही पिढी चिन्ह कां मागते? मी तुम्हांस खचीत सांगतों कीं या पिढीला चिन्ह दिलें जाणारच नाहीं. १३ नंतर तो त्यांस सोडून पुनः मचव्यांत बसून पलीकडे गेला.

१४ ते भाकरी घ्यावयास विसरले; आणि मचव्यांत त्यांच्याजवळ केवळ एकच भाकर होती. १५ मग त्यानें त्यांस निक्षून सांगितलें कीं संभाळा, परूश्यांचें खमीर व हेरोदाचें खमीर यांविषयीं जपा. १६ तेव्हां आपल्याजवळ भाकरी नाहींत ह्याविषयीं ते आपसांत विचार करूं लागले. १७ हें ओळखून येशू त्यांस म्हणाला, तुम्हांजवळ भाकरी नाहींत ह्याविषयीं विचार कां करितां? तुम्ही अजून ओळखत नाहीं व समजतहि नाहीं काय? तुमचें अंतःकरण कठीण झालें आहे काय? १८ 'डोळे असून तुम्ही पाहत नाहीं काय? कान असून तुम्ही ऐकत नाहीं काय?' तुम्हांस आठवण नाहीं काय? १९ मीं पांच हजारांसाठीं त्या पांच भाकरी मोडल्या, तेव्हां तुम्हीं तुकड्यांच्या किती टोपल्या भरून नेल्या? ते त्याला म्हणाले, बारा. २० तसेंच चार हजारांसाठीं सात भाकरी मोडल्या तेव्हां तुम्हीं तुकडे किती पाट्या उचलून नेले? ते त्याला म्हणाले, सात. २१ नंतर तो त्यांस म्हणाला, तुम्ही अजून समजत नाहीं काय?

### बेथसैदा येथें तो एका अंधळ्याला बरें करतो

२२ मग ते बेथसैदा येथें आले. तेव्हां लोकांनीं त्याजकडे एका अंधळ्याला आणिलें, व आपण त्याला स्पर्श करावा अशी त्याच्याजवळ विनंति केली. २३ तेव्हां त्यानें त्या अंधळ्याचा हात धरून त्याला गांवाबाहेर नेलें, आणि त्याच्या डोळ्यांत थुंकून व त्याजवर हात ठेवून त्याला विचारिलें, तुला कांहीं दिसतें काय? २४ तो वर पाहून म्हणाला, मला माणसें दिसत आहेत असें वाटतें, कारण तीं मला झाडांसारखीं दिसत आहेत, तरी चालत आहेत. २५ नंतर त्यानें त्याच्या डोळ्यांवर पुनः हात ठेविले; तेव्हां तो निरखून पाहूं लागला, आणि तो नीट झाला व सर्व वस्तु त्याला स्पष्ट दिसूं लागल्या. २६ मग त्यानें त्याला त्याच्या घरीं पाठवितांना सांगितलें कीं या गांवांत जाऊं देखील नको.

### येशू हा ख्रिस्त आहे अशी पेत्रानें दिलेली कबुली

२७ नंतर येशू व त्याचे शिष्य फिलिप्पाच्या कैसरियाकडल्या गांवांस गेले; तेव्हां वाटेंत त्यानें आपल्या शिष्यांस विचारिलें, लोक मला कोण म्हणून म्हणतात? २८ त्यांनीं उत्तर दिलें कीं बाप्तिस्मा करणारा योहान; कित्येक एलीया; कित्येक तर संदेष्ट्यांपैकीं एक असें म्हणतात. २९ त्यानें त्यांस विचारिलें, पण तुम्ही मला कोण म्हणून म्हणतां? पेत्रानें त्याला उत्तर दिलें, आपण ख्रिस्त आहां.

### आपलें मरण व पुनरुत्थान यांचें भविष्य येशू वर्तवितो

३० तेव्हां मजविषयीं कोणाला सांगूं नका असें त्यानें त्यांस निक्षून सांगितलें. ३१ मग तो त्यांस शिकवूं लागला कीं मनुष्याच्या पुत्रानें फार दुःख भोगावें, वडील मंडळ, मुख्य याजक व शास्त्री यांजकडून नाकारिलें जाऊन जिवें मारलें जावें, आणि त्यानें तीन दिवसांनंतर पुनः उठावें, यांचें अगत्य आहे. ३२ ही गोष्ट त्यानें उघड सांगितली; त्यावरून पेत्र त्याला जवळ घेऊन दटावूं लागला. ३३ तेव्हां तो वळून व आपल्या शिष्यांस पाहून पेत्राला धमकावून म्हणाला, अरे सैताना, माझ्यापुढून निघून जा;

कारण देवाच्या गोष्टींकडे तुझें लक्ष नाहीं, मनुष्यांच्या गोष्टींकडे आहे.

## 'स्व' ला फांटा देण्याबद्दल इशारा

३४ मग त्यानें आपल्या शिष्यांसुद्धां लोकसमुदायाला बोलावून त्यांस म्हटलें, कोणी माझा अनुयायी होऊं पाहत असल्यास त्यानें आत्मनिग्रह करावा व आपला वधस्तंभ उचलून घेऊन मला अनुसरावें. ३५ जो कोणी, आपला जीव वांचवूं पाहतो तो त्याला मुकेल; आणि जो कोणी मजकरितां व सुवार्तेकरितां आपल्या जीवाला मुकेल तो त्याला वांचवील. ३६ कारण मनुष्यानें सर्व जग मिळविलें आणि आपल्या जीवाचा नाश करून घेतला, तर त्याला काय लाभ ? ३७ मनुष्यानें आपल्या जीवाचा मोबदला काय द्यावा ? ३८ या व्यभिचारी व पापी पिढीमध्यें जो कोणी माझी व माझ्या वचनांची लाज धरील, त्याची लाज मनुष्याचा पुत्र पवित्र देवदूतांसहित आपल्या पित्याच्या गौरवानें येईल तेव्हां तोहि धरील.

९ १ आणखी त्यानें त्यांस म्हटलें, मी तुम्हांस खचीत सांगतों कीं येथें उभे राहणाऱ्यांतील कांहीं असे आहेत कीं देवाचें राज्य पराक्रमानें आलेलें पाहत तोंपर्यंत त्यांस मरणाचा अनुभव येणारच नाहीं.

## येशूचें रूपांतर

२ मग सहा दिवसांनंतर येशूनें पेत्र, याकोब व योहान यांस आपणाबरोबर एका उंच पर्वतावर एकीकडे नेलें; तेथें त्यांच्यादेखतां त्याचें रूप पालटलें; ३ त्याचीं वस्त्रें इतकीं पांढरीं चकचकीत झालीं, कीं तितकीं पांढरीं करील असा कोणी परीट पृथ्वीवर नाहीं. ४ तेव्हां मोशासह एलीया त्यांच्या दृष्टीस पडला; ते येशूबरोबर संभाषण करीत होते. ५ तेव्हां पेत्र येशूला म्हणाला, गुरुजी, आपण येथें असावें हें बरें आहे; तर आम्ही तीन मंडप करूं; आपणासाठीं एक, मोशासाठीं एक व एलीयासाठीं एक. ६ कारण काय बोलावयाचें हें त्याला सुचलें नाहीं; ते भयभीत झाले. ७ तेव्हां मेघ येऊन त्यांजवर छाया पडली; आणि मेघांतून अशी वाणी झाली कीं हा माझा प्रिय पुत्र आहे, याचें तुम्ही ऐका. ८ मग त्यांनीं एकाएकीं सभोंवतें पाहिलें तों केवळ येशूशिवाय त्यांच्याजवळ आणखी कोणी त्यांच्या दृष्टीस पडलें नाहीं.

९ नंतर ते डोंगरावरून उतरत असतां त्यानें त्यांस आज्ञा केली कीं, तुम्हीं जें पाहिलें तें मनुष्याचा पुत्र मेलेल्यांतून पुनः उठेपर्यंत कोणाला कळवूं नका. १० ही गोष्ट मनांत धरून मेलेल्यांतून पुनः उठणें म्हणजे काय याविषयीं ते आपसांत विचार करूं लागले. ११ मग त्यांनीं त्याला विचारलें, एलीया प्रथम आला पाहिजे, असें शास्त्री म्हणतात हें कसें ? १२ त्यानें त्यांस उत्तर दिलें कीं 'एलीया प्रथम येऊन सर्व कांहीं यथास्थित करितो' हें खरें; तरी मनुष्याच्या पुत्राविषयीं असें कसें लिहिलें आहे कीं त्यानें फार दुःख भोगावें व तुच्छ मानिलें जावें ? १३ मी तुम्हांस सांगतों कीं एलीया आला आहे, आणि त्याजविषयीं लिहिल्याप्रमाणें त्यांनीं मनास वाटलें तसें त्याला केलें.

## भूतग्रस्त मुलाला बरें करणें

१४ नंतर ते शिष्यांजवळ आले तों त्यांच्याभोंवती लोकसमुदाय आहे व त्यांजबरोबर शास्त्री संवाद करीत आहेत असें त्यांनीं पाहिलें. १५ तेव्हां त्याला पाहतांच सर्व लोक फार चकित झाले व धावत जाऊन त्यांनीं त्याला नमस्कार केला. १६ मग त्यानें त्यांस विचारिलें, तुम्ही यांजशीं काय संवाद करितां ? १७ लोकसमुदायांतील एकानें उत्तर दिलें, हे गुरू, मी आपणाकडे आपल्या मुलाला घेऊन आलों, याला मुका आत्मा लागला आहे. १८ याला जेथें कोठें तो धरितो तेथें आपटतो, आणि हा तोंडाला फेस आणून दांत कडकडां खातो व क्षीण होतो; त्याला काढावें म्हणून मीं आपल्या शिष्यांस सांगितलें, परंतु त्यांना त्याला काढतां येईना. १९ त्यानें त्याला उत्तर दिलें कीं अहाहा ! विश्वासहीन पिढी, मी तुम्हांबरोबर कोठवर असूं ? कोठवर तुमचें सहन करूं ? त्याला मजकडे आणा. २० त्यांनीं त्याला त्याजकडे आणिलें, तेव्हां आत्म्यानें त्याला पाहतांच त्याला पिळून टाकिलें आणि तो जमिनीवर पडून तोंडाला फेस आणून लोळूं लागला. २१ तेव्हां त्यानें त्याच्या बापाला विचारिलें कीं असें याला होऊन किती काळ झाला ? त्यानें म्हटलें, हें बाळपणापासून आहे. २२ त्यानें याला

घात करण्याकरितां याला बहुत वेळां विस्तवांत व पाण्यांतहि टाकिलें; आपल्यानें कांहीं करवेल तर आम्हांवर करुणा करून आम्हांला साहाय्य करा. २३ येशू त्याला म्हणाला, माझ्यानें करवेल ! विश्वास धरणाऱ्याला सर्व कांहीं साध्य आहे. २४ तेव्हांच मुलाचा बाप [ डोळ्यांत आसवें आणून ] मोठ्यानें म्हणाला, मी विश्वास धरितों; माझा अविश्वास काढून टाकण्यास मला साहाय्य करा. २५ त्या वेळीं लोकसमुदाय धावत तिकडे येत आहे असें पाहून येशूनें अशुद्ध आत्म्याला धमकावून म्हटलें, अरे मुक्याबहिऱ्या आत्म्या, याच्यांतून नीघ व पुनः कधीं याच्यांत शिरूं नको अशी मी तुला आज्ञा करितों. २६ तेव्हां तो ओरडून व त्याला फार पिळून निघाला; आणि तो मेल्यासारिखा झाला म्हणून तो मेला, असें बहुतेक लोक बोलूं लागले; २७ पण येशूनें त्याचा हात धरून त्याला उठविलें; व तो उभा राहिला. २८ तो घरांत गेल्यावर त्याच्या शिष्यांनीं त्याला एकांतीं विचारिलें कीं आमच्यानें त्याला कां काढवलें नाहीं? २९ तो त्यांस म्हणाला, ही जात प्रार्थनेवांचून [ व उपासावांचून ] दुसऱ्या कशानेंहि निघत नाहीं.

### आपल्या मृत्यूबद्दल येशूनें दुसऱ्यांदा केलेलें भविष्य

३० नंतर ते तेथून निघून गालीलामधून चालले होते; आणि हें कोणास कळूं नये, अशी त्याची इच्छा होती. ३१ तो आपल्या शिष्यांस शिकवीत होता; तो त्यांस म्हणाला कीं मनुष्याचा पुत्र मनुष्यांच्या हातीं दिला जात आहे; ते त्याला जिवें मारितील; आणि जिवें मारिल्यानंतर तो तिसऱ्या दिवशीं पुनः उठेल; ३२ परंतु हा बोलण्याचा अर्थ ते समजले नाहींत व त्याला विचारण्याची त्यांस भीति वाटली.

### नम्रतेचा धडा

३३ पुढें ते कफर्णहूमांत आले; आणि तो घरांत असतां त्यानें त्यांस विचारिलें, तुम्ही वाटेंत काय संवाद करीत होतां? ३४ ते उगेच राहिले, कारण सर्वांत मोठा कोण याविषयीं त्यांनीं वाटेंत आपसांत वादविवाद केला होता. ३५ नंतर तो खालीं बसला आणि आपल्या बारा शिष्यांस बोलावून त्यांस म्हणाला, आपण पहिलें व्हावें असें कोणाच्या मनांत असल्यास त्यानें सर्वांत शेवटलें व सर्वांचा सेवक असें व्हावें. ३६ मग त्यानें एका बाळकास उचलून घेऊन त्यांच्या मध्यें ठेविलें व त्याला कंवटाळून धरून त्यांस म्हटलें, ३७ जो कोणी माझ्या नामानें अशा बाळकांपैकीं एकाला स्विकारीतो तो मला स्वीकारितो, व जो कोणी मला स्वीकारितो, तो मला नाहीं तर ज्यानें मला पाठविलें त्याला स्वीकारितो.

### सहिष्णुतेचें शिक्षण

३८ योहानानें त्याला म्हटलें, गुरुजी, कोणीएकाला आपल्या नामानें भूतें काढितांना आम्हीं पाहिलें, तेव्हां त्याला आम्हीं मना केलें, कारण तो आमचा अनुयायी नव्हता. ३९ येशू म्हणाला, त्याला मना करूं नका, कारण जो माझ्या नामानें अद्भुत कृत्य करील व लागलीच माझी निंदा करील असा कोणी नाहीं. ४० जो आपल्याला प्रतिकूल नाहीं तो आपल्याला अनुकूळ आहे. ४१ तुम्ही ख्रिस्ताचे म्हणून जो कोणी तुम्हांस पाण्याचा प्याला प्यावयास देईल तो आपल्या प्रतिफळाला मुकणार नाहीं हें मी तुम्हांला खचीत सांगतों.

### इतरांना अडखळण करण्याच्याविरुद्ध इशारा

४२ मजवर विश्वास ठेवणाऱ्या या लहानांतील एकाला जो कोणी अडखळवील त्याच्या गळ्यांत मोठ्या जात्याची तळी बांधून त्यास समुद्रांत टाकावें हें त्याला बरें. ४३, ४४ तुझ्या हातानें तुला अडखळविलें तर तो तोडून टाक; दोन हात असून नरकांत म्हणजे न विझणाऱ्या अग्नींत [ जेथें 'त्यांचा किडा मरत नाहीं व अग्नि विझत नाहीं' तेथें ] जावें, यापेक्षां व्यंग होऊन जीवनांत जावें हें तुला बरें. ४५, ४६ तुझा पाय तुला अडखळवितो तर तो तोडून टाक; दोन पाय असून [ जेथें 'त्यांचा किडा मरत नाहीं व अग्नि विझत नाहीं' अशा ] नरकांत टाकिलें जावें, यापेक्षां पंगू होऊन जीवनांत जावें हें तुला बरें. ४७, ४८ तुझा डोळा तुला अडखळवितो तर तो उपटून टाक; दोन डोळे असून, जेथें 'त्यांचा किडा मरत नाहीं व अग्नि विझत नाहीं,' अशा नरकांत टाकिलें जावें, यापेक्षां एकडोळ्या होऊन देवाच्या राज्यांत जावें हें तुला बरें.

४९ प्रत्येक मनुष्य अग्नीनें शुद्ध केला जाईल [ व प्रत्येक
बलिदान मिठानें खारट करितील ]. ५० मीठ चांगला
पदार्थ आहे; परंतु मिठाचा खारटपणाच गेला तर तो कशानें
आणाल ? तुम्ही आपणांत मीठ असूं द्या व एकमेकांबरोबर
शांतीनें राहा.

### सूटपत्रविषयक एक प्रश्न

१ मग तो तेथून निघून यहूदीयाच्या
१० सीमेवरील प्रांतांत यार्देनेच्या पलीकडे आला; तेव्हां
पुनः लोकसमुदाय एकत्र जमून त्याजकडे आले;
आणि तो आपल्या चालीप्रमाणें त्यांस पुनः शिकवूं लागला.
२ परूश्यांनीं येऊन त्याची परीक्षा पाहण्याकरितां त्याला
विचारिलें, पुरुषानें आपल्या बायकोला टाकावें हें योग्य
आहे काय ? ३ त्यानें त्यांस उत्तर दिलें कीं मोशानें
तुम्हांस काय आज्ञा केली ? ४ ते म्हणाले, ‘ सूटपत्र लिहून
तिला टाकावयास ’ मोशानें परवानगी दिली. ५ येशू त्यांस
म्हणाला कीं तुमच्या अंतःकरणाच्या कठीणपणामुळें त्यानें
ही आज्ञा तुम्हांसाठीं लिहून ठेविली; ६ तरी ‘ त्यानें तीं
नरनारी अशीं उत्पन्न केलीं ’ असें उत्पत्तीच्या प्रारंभापासून
आहे. ७ ‘ या कारणामुळें पुरुष आपल्या आईबापांस
सोडून आपल्या बायकोला जडून राहील; आणि तीं दोघें
एकदेह होतील;’ ८, ९ तीं पुढें दोन नव्हत तर एकदेह
आहेत. यास्तव देवानें जें जोडिलें आहे तें मनुष्यांनीं
तोडूं नये. १० नंतर घरांत त्याच्या शिष्यांनीं पुनः त्याच
गोष्टीविषयीं त्याला विचारिलें. ११ तेव्हां तो त्यांस म्हणाला,
जो कोणी आपल्या बायकोला टाकून दुसरीबरोबर लग्न करितो
तो तिजविरुद्ध व्यभिचार करितो; १२ आणि जर ती स्वतः
आपल्या नवऱ्याला टाकिते व दुसऱ्याबरोबर लग्न करिते
तर ती व्यभिचार करिते.

### येशू लहान मुलांना आशीर्वाद देतो

१३ मग लोकांनीं त्याजकडे बाळकांस आणिलें,
यासाठीं कीं त्यानें त्यांस स्पर्श करावा; परंतु शिष्यांनीं
आणणाऱ्यांस दटाविलें. १४ तें पाहून येशूला फार वाईट
वाटलें; आणि तो त्यांस म्हणाला, बाळकांस माझ्याजवळ
येऊं द्या; त्यांस मना करूं नका; कारण देवाचें राज्य
असल्यांचेंच आहे. १५ मी तुम्हांस खचीत सांगतों, जो
कोणी बाळकासारिखा होऊन देवाच्या राज्याचा स्वीकार
करणार नाहीं त्याचा त्यांत प्रवेश होणार नाहीं. १६ तेव्हां
त्यानें त्यांस कंवटाळून व त्यांजवर हात ठेवून त्यांस
आशीर्वाद दिला.

### शाश्वत जीवनप्राप्त्यर्थ काय करावें म्हणून एक श्रीमंत तरुण प्रश्न करतो

१७ मग तो निघून वाटेस लागणार तों एकानें धावत
येऊन व त्याच्यापुढें गुडघे टेकून त्याला विचारिलें, उत्तम
गुरुजी, सार्वकालिक जीवन हें वतन मिळविण्यास मीं काय
करावें ? १८ येशू त्याला म्हणाला, मला उत्तम कां
म्हणतोस ? एक म्हणजे देव, त्याजवांचून कोणी उत्तम
नाहीं. १९ आज्ञा तुला ठाऊक आहेत; ‘ मनुष्यहत्या करूं
नको, व्यभिचार करूं नको, चोरी करूं नको, खोटी साक्ष
देऊं नको ,’ ठकवूं नको, ‘आपला बाप व आपली आई
यांचा मान राख. ’ २० त्यानें उत्तर दिलें, गुरुजी, मीं
आपल्या लहानपणापासून हें सर्व पाळिलें आहे. २१ येशूनें
त्याजकडे न्याहाळून पाहून त्याजवर प्रीति केली, व त्याला
म्हटलें, एक गोष्ट तुझ्यांत उणी आहे; जा, तुझें आहेनाहीं
तें विकून दरिद्र्यांस दे म्हणजे तुला स्वर्गांत संपत्ति मिळेल;
चल, माझ्या मागें ये; २२ परंतु तो हें वचन ऐकून
म्लानमुख झाला व कष्टी होऊन निघून गेला; कारण तो
फार श्रीमान् होता.

### संपत्तीची आडकाठी

२३ तेव्हां येशूनें सभोवतें पाहून आपल्या शिष्यांस
म्हटलें, श्रीमंतांचा देवाच्या राज्यांत प्रवेश होणें किती
कठीण आहे ! २४ तेव्हां शिष्य त्याच्या बोलण्यानें थक्क
झाले. येशूनें त्यांस पुनः म्हटलें, मुलांनो, देवाच्या राज्यांत
प्रवेश होणें किती कठीण आहे ! २५ धनवानानें देवाच्या
राज्यांत जाणें यापेक्षां उंटानें सुईच्या नेढ्यांतून जाणें सोपें
आहे. २६ तेव्हां ते अत्यंत विस्मित होऊन त्याला
म्हणाले, तर मग कोणाचें तारण होईल ? २७ येशूनें
त्यांजकडे न्याहाळून पाहून म्हटलें, मनुष्यांस हें असाध्य
आहे, परंतु देवाला नाहीं; ‘ देवाला सर्व कांहीं साध्य
आहे. ’ २८ पेत्र त्याला म्हणूं लागला, पाहा, आम्ही सर्व

१ मुळांत : खारविला

सोडून आपले अनुयायी झालों आहों. २९ येशूनें उत्तर
दिलें, मी तुम्हांस खचींत सांगतों, ज्यानें मजकरितां व
सुवार्तेकरितां घर, भाऊ, बहिणी, आई, बाप, मुलें किंवा
शेतें सोडिलीं आहेत ३० अशा कोणाहि इसमाला, या
सांप्रतकाळीं शंभरपट घरें, भाऊ, बहिणी, आया, मुलें, व
शेतें, त्यांबरोबर पाठलाग आणि येणाऱ्या युगांत सार्वकालिक
जीवन मिळाल्यावांचून राहणार नाहीं. ३१ तरी जे पहिले
ते शेवटले व शेवटले ते पहिले, असें बहुतांचें होईल.

### आपल्या मृत्यूबद्दल येशूनें तिसऱ्यांदा केलेलें भविष्य

३२ मग ते मार्गस्थ होऊन यरुशलेमास वर जात
असतां येशू त्यांच्यापुढें चालत होता, तेव्हां ते थक्क झाले;
आणि जे त्याच्या मागून चालत होते त्यांना भीति प्राप्त
झाली. तेव्हां तो पुनः आपल्या बारा शिष्यांस जवळ
घेऊन आपणाला जें घडणार तें त्यांस सांगूं लागला : ३३
पाहा, आपण वर यरुशलेमास जात आहों; मनुष्याच्या
पुत्राला मुख्य याजक व शास्त्री यांच्या स्वाधीन करण्यांत
येईल; ते त्याला मरणदंड ठरवितील, विदेश्यांच्या स्वाधीन
करितील; ३४ ते त्याची थट्टा करितील, त्याजवर थुंकतील,
त्याला फटके मारितील, व त्याचा जीव घेतील; आणि तीन
दिवसांनीं तो पुनः उठेल.

### याकोब व योहान यांची विनंति

३५ जब्दीचे पुत्र याकोब व योहान हे त्याच्याजवळ
येऊन म्हणाले, गुरुजी, जें कांहीं आम्ही आपणाजवळ
मागूं त्याप्रमाणें आपण आम्हांसाठीं करावें अशी आमची
इच्छा आहे. ३६ तो त्यांस म्हणाला, मीं तुम्हांसाठीं काय
करावें म्हणून तुमच्या मनांत आहे? ३७ ते त्याला
म्हणाले, आपल्या वैभवांत एकाला आपल्या उजवीकडे व
एकाला आपल्या डावीकडे बसविण्याची कृपा व्हावी. ३८
येशूनें त्यांस म्हटलें, तुम्ही मागतां तें तुम्हांस समजत
नाहीं; जो प्याला मी पिणार आहें तो तुमच्यानें पिववेल
काय? व जो बाप्तिस्मा मी घेणार आहें तो तुमच्यानें
घेववेल काय? ३९ ते त्याला म्हणाले, घेववेल. येशूनें
त्यांस म्हटलें, जो प्याला मी पिणार आहें तो तुम्ही प्याल
व जो बाप्तिस्मा मी घेणार आहें तो तुम्ही घ्याल हें खरें;
४० पण माझ्या उजवीकडे व माझ्या डावीकडे बसण्याचा
अधिकार हा ज्यांच्यासाठीं सिद्ध केला आहे त्यांच्यावांचून
दुसऱ्या कोणास देणें हें मजकडे नाहीं.

### खरें मोठेपण

४१ हें ऐकून बाकीचे दहा जण याकोब व योहान
यांना रागें भरूं लागले. ४२ येशूनें त्यांस जवळ बोलावून
म्हटलें, विदेश्यांत अधिकारी म्हणून जे मानिलेले आहेत ते
त्यांजवर प्रभुत्व चालवितात; व त्यांचे मोठे लोक त्यांजवर
सत्ता करितात हें तुम्हांस ठाऊक आहे; ४३ परंतु तुम्हांमध्यें
तसें नाहीं; तर जो कोणी तुम्हांमध्यें मोठा होऊं पाहतो त्यानें
तुमचा सेवक व्हावें; ४४ आणि जो कोणी तुम्हांमध्यें पहिला
होण्यास इच्छितो त्यानें सर्वांचा दास व्हावें. ४५ कारण
मनुष्याचा पुत्रहि सेवा घ्यावयास नाहीं, तर सेवा करावयास
व बहुतांच्या खंडणीस्तव आपला जीव द्यावयास आला.

### अंधळ्या बार्तीमयाला दृष्टिदान

४६ नंतर ते यरीहोस आले; मग तो, त्याचे शिष्य व
मोठा लोकसमुदाय हे यरीहोहून बाहेर जात असतां, तीमय
याचा पुत्र बार्तीमय हा अंधळा भिकारी वाटेवर बसला
होता. ४७ तेव्हां हा नासरेथकर येशू आहे हें ऐकून तो
ओरडून म्हणूं लागला : अहो येशू, दावीदपुत्र, मजवर दया
करा. ४८ तेव्हां त्यानें गप्प राहावें म्हणून बहुतांनीं त्याला
दटाविलें, परंतु तो अधिकच ओरडूं लागला : अहो दावीद-
पुत्र, मजवर दया करा. ४९ तेव्हां येशूनें उभें राहून त्याला
बोलवावयास सांगितलें. मग ते त्या अंधळ्याला बोलावून
म्हणाले, धीर धर, ऊठ, ते तुला बोलावीत आहेत. ५०
तेव्हां तो आपलें वस्त्र टाकून त्वरेनें उठून येशूकडे आला.
५१ येशू त्याला म्हणाला, मीं तुजसाठीं काय करावें म्हणून
तुझी इच्छा आहे? अंधळा त्याला म्हणाला, गुरुजी, मला
दृष्टि प्राप्त व्हावी. ५२ येशू त्याला म्हणाला, जा, तुझ्या
विश्वासानें तुला बरें केलें आहे. तेव्हां लागलीच त्याला
दृष्टि आली; आणि तो वाटेनें येशूच्यामागें चालला.

### यरुशलेमांत येशूचा जयोत्सवानें प्रवेश

११ १ ते यरुशलेमाजवळील जैतूनांच्या डोंगरा-
जवळ बेथफगे व बेथानी येथवर पोहंचले, तेव्हां
त्यानें आपल्या शिष्यांतून दोघांस असें सांगून

पाठविलें कीं २ समोरच्या गांवांत जा; त्यांत जातांच
ज्याच्यावर कोणी मनुष्य कधीं बसलें नाहीं असें शिंगरूं
तुम्हांस बांधलेलें आढळेल, तें सोडून आणा. ३ तुम्ही हें
का करितां, असें कोणीं तुम्हांस म्हटलें, तर प्रभूला याची
गरज आहे, आणि तो लागलेंच तें इकडे परत पाठवील
असें सांगा. ४ तेव्हां ते निघाले व परसांतील वाटेवर
दाराबाहेर बांधलेलें एक शिंगरूं त्यांस आढळलें, तें ते
सोडूं लागले. ५ तेव्हां तेथें उभे राहणाऱ्यांतील कित्येक
त्यांस म्हणाले, तुम्ही शिंगरूं सोडून काय करितां? ६
त्यांनीं त्यांस येशूनें सांगितल्याप्रमाणें उत्तर दिलें; तेव्हां
त्यांनीं त्यांस जाऊं दिलें. ७ नंतर त्यांनीं तें शिंगरूं येशूकडे
आणून त्याच्यावर आपलीं वस्त्रें घातलीं, व त्यावर तो
बसला. ८ मग पुष्कळ लोकांनीं आपलीं वस्त्रें वाटेवर पस-
रलीं; इतरांनीं शेतांतून डहाळे तोडून आणून वाटेवर
पसरिले; ९ आणि पुढें चालणारे व मागें चालणारे गजर
करून बोलले, 'होसान्ना, प्रभूच्या नामानें येणारा धन्य-
वादित असो;' १० येणारें राज्य, आमचा बाप दावीद
याचें राज्य, धन्यवादित असो; ऊर्ध्वलोकीं 'होसान्ना.'
११ नंतर तो यरुशलेमांत येऊन मंदिरांत गेला, आणि
त्यानें चहूंकडे सर्व पाहिल्यावर संध्याकाळ झाली, तेव्हां
तो आपल्या बारा शिष्यांसह बेथानीस निघून गेला.

## निष्फळ अंजिराचें झाड

१२ दुसऱ्या दिवशीं ते बेथानीहून निघाल्यावर त्याला
भूक लागली. १३ तेव्हां पाल्यानें भरलेलें असें अंजिराचें
एक झाड त्यानें दुरून पाहिलें, आणि कदाचित् त्यावर
कांहीं मिळेल म्हणून तो त्याकडे गेला; परंतु तेथें गेल्यावर
पानांवांचून त्याला कांहीं आढळलें नाहीं; कारण अंजिरांचा
हंगाम आला नव्हता. १४ तेव्हां त्यानें त्याला म्हटलें,
यापुढें कोणी तुझें फळ कधींहि न खावो. हें त्याच्या
शिष्यांनीं ऐकलें.

## येशू मंदिराचें शुद्धीकरण करतो

१५ मग ते यरुशलेमास आले, आणि तो मंदिरांत
जाऊन तेथें क्रयविक्रय करणाऱ्यांना बाहेर घालवूं लागला,
आणि सराफांचे चौरंग व कबुतरें विकणाऱ्यांच्या बैठकी
त्यानें पालथ्या केल्या. १६ मंदिरामधून त्यानें कोणालाहि
कसलेंच भांडें नेऊं दिलें नाहीं; १७ आणि त्यानें त्यांस
शिक्षण देत असतां म्हटलें कीं 'माझ्या घराला सार्वराष्ट्रीय
प्रार्थनामंदिर म्हणतील,' असें लिहिलेलें नाहीं काय? परंतु
तुम्हीं तें 'लुटारूंची गुहा' केलें आहे. १८ हें मुख्य
याजकांनीं व शास्त्र्यांनीं ऐकून त्याचा घात कसा करावा
याविषयीं योजना केली; त्यांना त्याची भीति वाटली, कारण
सर्व लोक त्याच्या शिक्षणावरून थक्क झाले होते.
१९ प्रतिदिवशीं संध्याकाळ झाल्यावर ते नगराच्या
बाहेर जात असत.

## श्रद्धेचें सामर्थ्य

२० मग पहाटेस वाटेनें जातांना त्यांनीं तें अंजिराचें
झाड मुळापासून वाळून गेलें असल्याचें पाहिलें. २१ तेव्हां
पेत्राला आठवण होऊन तो त्याला म्हणाला, गुरुजी, पाहा,
आपण ज्या अंजीरझाडाला शाप दिला तें वाळून गेलें
आहे. २२ येशूनें त्यांस उत्तर दिलें, देवावर विश्वास ठेवा;
२३ मी तुम्हांस खचीत सांगतों, जो कोणी या डोंगराला,
तूं उपटून समुद्रांत टाकिला जा, असें म्हणेल, आणि
आपल्या अंतःकरणांत संशय न धरितां, आपण म्हणतों तें
घडेल असा विश्वास धरील, त्याचें तें घडून येईल.
२४ यास्तव मी तुम्हांस सांगतों, जें कांहीं तुम्ही प्रार्थना
करून मागाल तें तुम्हांला मिळालेंच आहे असा विश्वास
धरा, म्हणजे तें तुम्हांस प्राप्त होईल. २५ आणखी तुम्ही
उभे राहून प्रार्थना करितां तेव्हां तुमच्या मनांत कोणा-
विषयीं कांहीं असेल तर त्याची क्षमा करा; हें यासाठीं कीं
तुमच्या स्वर्गांतील पित्यानें तुमच्या अपराधांची क्षमा
करावी. [२६ परंतु तुम्ही जर क्षमा करणार नाहीं तर
तुमचा स्वर्गांतील पिताहि तुमच्या अपराधांची क्षमा
करणार नाहीं.]

## येशूच्या अधिकाराविषयीं संशय घेण्यांत येतो

२७ मग ते पुनः यरुशलेमास आले, आणि तो मंदि-
रांत फिरत असतां त्याजकडे मुख्य याजक, शास्त्री,
व वडील येऊन त्याला म्हणाले, २८ तुम्हीं कोणत्या अधि-
कारानें हें करितां आणि हें करावयाचा अधिकार तुम्हांला
कोणीं दिला? २९ येशूनें त्यांस म्हटलें, मीहि तुम्हांस एक
प्रश्न करितों; मला उत्तर द्या, म्हणजे कोणत्या अधिकारानें

मी हें करितों तें तुम्हांस सांगेन. ३० योहानाचा बाप्तिस्मा
स्वर्गापासून किंवा मनुष्यांपासून होता याचें मला उत्तर
द्या. ३१ तेव्हां ते आपसांत विचार करूं लागले : स्वर्गा-
पासून होता असें म्हणूं तर तो म्हणेल कीं असें असतां
तुम्हीं त्याजवर विश्वास कां ठेविला नाहीं? ३२ मनुष्यां-
पासून होता असें म्हणावें तर लोकांची त्यांना भीति
वाटली, कारण योहान खरोखर संदेष्टा होता असें सर्व
मानीत होते. ३३ तेव्हां त्यांनीं येशूला उत्तर दिलें,
आम्हांस ठाऊक नाहीं. येशूनें त्यांस म्हटलें, तर कोणत्या
अधिकारानें मी हें करितों हें मीहि तुम्हांस सांगत नाहीं.

## द्राक्षमळ्याचा दृष्टांत

१२ १ मग तो दाखले देऊन त्यांजबरोबर बोलूं
लागला. कोणाएका मनुष्यानें 'द्राक्षमळा लाविला,
त्याभोवतें कुंपण घातलें, द्राक्षरसासाठीं कुंड
खणिलें, माळा बांधिला,' आणि तो माळ्यांस सोपून देऊन
आपण परदेशास गेला. २ मग हंगामीं आपणास माळ्यां-
पासून द्राक्षमळ्याच्या फळांतून कांहीं मिळावें म्हणून त्यानें
माळ्यांकडे एका दासास पाठविलें. ३ त्याला त्यांनीं धरून
मारिलें व रिकामें लावून दिलें; ४ त्यानें पुनः दुसऱ्या
दासास त्यांजकडे पाठविलें; त्यांनीं त्याचें डोकें फोडून
त्याचा अपमान केला. ५ त्यानें आणखी एका जणास
पाठविलें; त्याला त्यांनीं जिवें मारिलें; आणि दुसऱ्या बहु-
तांस तसेंच केलें; म्हणजे त्यांतून कित्येकांस मारिलें व कित्ये-
कांचा जीव घेतला. ६ अद्यापि त्याच्याजवळ एक जण
राहिला होता, तो त्याचा आवडता पुत्र. आपल्या पुत्राची
ते भीड धरितील, असें म्हणून त्यानें त्याला शेवटीं त्यांजकडे
पाठविलें; ७ परंतु ते माळी आपसांत म्हणाले, हा वारीस
आहे; चला, आपण याला जिवें मारूं, म्हणजे वतन
आपलें होईल. ८ मग त्यांनीं त्याला धरून जिवें मारिलें
व द्राक्षमळ्याबाहेर फेकून दिलें. ९ तर मग द्राक्षमळ्याचा
धनी काय करील? तो येऊन त्या माळ्यांचा समूळ नाश
करील, व द्राक्षमळा दुसऱ्यांस देईल.

१० जो धोंडा बांधणाऱ्यांनीं नापसंत केला
तोच कोनशिला झाला;
११ हें प्रभूकडून झालें,
आणि हें आमच्या दृष्टीनें आश्चर्यकारक कृत्य आहे; हा
शास्त्रलेखहि तुमच्या वाचण्यांत कधीं आला नाहीं काय?
१२ तेव्हां ते त्याला धरावयास पाहत होते, परंतु लोक-
समुदायाची त्यांस भीति वाटली. कारण हा दाखला त्यानें
आपल्याला लावून सांगितला असें त्यांनीं ताडिलें; मग ते
त्याला सोडून निघून गेले.

## कैसराला कर देण्याविषयींचा प्रश्न

१३ नंतर त्याला बोलण्यांत धरण्याकरितां त्यांनीं परूशी
व हेरोदी यांतील कित्येकांस त्याजकडे पाठविलें. १४ ते
येऊन त्याला म्हणाले, गुरुजी, आम्हांस ठाऊक आहे कीं,
आपण खरे आहां, व कोणाची भीड धरीत नाहीं; आपण
मनुष्यांचें तोंड पाहून बोलत नाहीं तर देवाचा मार्ग
खरोखर शिकवितां; कैसराला कर देणें हें योग्य आहे किंवा
नाहीं? १५ आम्हीं द्यावा किंवा न द्यावा? तो त्यांचें ढोंग
ओळखून त्यांस म्हणाला, माझी परीक्षा कां पाहतां? मला
एक पावली पाहावयास आणा. १६ त्यांनीं ती आणिली;
तेव्हां त्यानें त्यांस म्हटलें, हा मुखवटा व लेख कोणाचा?
ते त्याला म्हणाले, कैसराचा. १७ येशूनें त्यांस म्हटलें,
तर कैसराचें कैसराला व देवाचें देवाला भरून द्या. तेव्हां
त्यांनीं त्याजविषयीं फार आश्चर्य केलें.

## पुनरुत्थानाविषयीं प्रश्न

१८ मग पुनरुत्थान नाहीं असें म्हणणारे सदूकी यांनीं
त्याजकडे येऊन त्याला विचारिलें, १९ गुरुजी, मोशानें
आम्हांसाठीं असें लिहून ठेविलें कीं 'कोणीएकाचा भाऊ मेला'
आणि त्याची स्त्री मागें राहिली असून 'संतति झालेली
नसली, तर त्याच्या भावानें त्याच्या स्त्रीबरोबर विवाह
करून आपल्या भावाचा वंश चालवावा.' २० कोणी सात
भाऊ होते, त्यांजपैकीं पहिल्यानें बायको केली व तो संतति
नसतां मेला; २१ मग ती दुसऱ्यानें केली, तोहि संतति
नसतां मेला, तिसराहि तसाच. २२ याप्रमाणें सातहि जण
संतति नसतां मेले. सर्वांच्या शेवटीं बायकोहि मेली. २३
तर पुनरुत्थानसमयीं ती त्यांच्यांतून कोणाची बायको
होईल? कारण ती सातांचीहि बायको झाली होती. २४
येशू त्यांस म्हणाला, तुम्ही शास्त्र व देवाचें सामर्थ्य हीं न
ओळखल्यामुळें भ्रमांत पडलां आहां ना? २५ कारण ते

मेलेल्यांतून उठल्यावर लग्न करून घेत नाहींत, व लग्न
करून देतहि नाहींत; तर स्वर्गांतील देवदूतांप्रमाणें असतात.
२६ मेलेले उठविले जातात याविषयीं, मोशाच्या पुस्तकां-
तील झुडपाच्या प्रकरणांत, देवानें त्याला म्हटलें, 'मी
अब्राहामाचा देव, इसहाकाचा देव व याकोबाचा देव आहें,'
हें तुमच्या वाचण्यांत आलें नाहीं काय? २७ तो मृतांचा
देव नव्हे तर जीवंतांचा आहे; तुम्ही मोठ्या भ्रमांत
पडलां आहां.

### सर्वांत मोठी आज्ञा कोणती हा प्रश्न

२८ तेव्हां शास्त्र्यांतील एकानें येऊन त्यांचा संवाद
ऐकला, आणि त्यानें त्यांस समर्पक उत्तर दिलें हें पाहून
त्याला विचारिलें, सर्वांत पहिली आज्ञा कोणती? २९
येशूनें उत्तर दिलें, पहिली ही आहे कीं 'हे इस्राएला, श्रवण
कर; आपला देव परमेश्वर हा अनन्य परमेश्वर आहे; ३०
तूं आपला देव परमेश्वर याजवर पूर्ण मनानें, पूर्ण जिवानें
पूर्ण बुद्धीनें व पूर्ण शक्तीनें प्रीति कर.' ३१ दुसरी ही
कीं 'जशी आपणावर तशी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति
कर.' यांहून मोठी दुसरी कोणतीहि आज्ञा नाहीं.
३२ तो शास्त्री त्याला म्हणाला, गुरुजी, आपण खरोखर
बरोबर बोललां कीं 'तो एकच आहे, आणि त्याच्याशिवाय
दुसरा नाहीं;' ३३ आणि 'पूर्ण मनानें, पूर्ण बुद्धीनें, व पूर्ण
शक्तीनें त्याजवर प्रीति करणें' आणि 'जशी आपणावर
तशी शेजाऱ्यावर प्रीति करणें' हें सर्व 'होम व यज्ञ'
यांपेक्षां अधिक आहे. ३४ त्यानें शहाणपणानें प्रत्युत्तर
दिलें हें पाहून येशूनें त्याला म्हटलें, तूं देवाच्या राज्या-
पासून दूर नाहींस. तेव्हांपासून त्याला आणखी कांहीं
विचारावयास कोणीहि धजलें नाहीं.

### ख्रिस्त, दाविदाचा पुत्र

३५ नंतर येशू मंदिरांत शिक्षण देत असतां म्हणाला,
ख्रिस्त दाविदाचा पुत्र आहे, हें शास्त्री कसें म्हणतात? ३६
कारण दाविदानें स्वतः पवित्र आत्म्यांत म्हटलें,

परमेश्वरानें माझ्या प्रभूला सांगितलें,
मी तुझ्या शत्रूंना तुझ्या पायांचें आसन करीपर्यंत
तूं माझ्या उजवीकडे बैस.

३७ दावीद स्वतः त्याला प्रभु म्हणतो, मग तो त्याचा
पुत्र आहे हें कसें? हें त्याचें बोलणें लोकसमुदायानें
हर्षानें ऐकलें.

### शास्त्र्यांसंबंधानें इशारा

३८ तो आपल्या शिकवणींत त्यांस म्हणाला, शास्त्र्यां-
विषयीं जपा; त्यांस लांब झगे घालून फिरणें, बाजारांत
नमस्कार घेणें ३९ आणि सभास्थानांत मुख्य आसनें व
मेजवानींत मुख्य स्थानें हीं आवडतात. ४० ते विधवांचीं
घरें खाऊन टाकितात व दांभिकपणें लांबलांब प्रार्थना
करितात; त्यांस अधिक दंड होईल.

### विधवेनें केलेलें दान

४१ मग भांडारासमोर बसून लोक भांडारांत पैका कसे
टाकितात हें तो पाहत असतां बहुत धनवान् लोकांनीं
पुष्कळ टाकिलें; ४२ आणि एका दरिद्री विधवेनें येऊन
दोन टोल्या म्हणजे एक दमडी टाकिली. ४३ तेव्हां त्यानें
आपल्या शिष्यांस जवळ बोलावून त्यांस म्हटलें, मी
तुम्हांस खचीत सांगतों कीं जे भांडारांत टाकीत आहेत
त्या सर्वांपेक्षां या दरिद्री विधवेनें अधिक टाकिलें. ४४
कारण त्या सर्वांनीं आपल्या समृद्धींतून टाकिलें; परंतु हिनें
आपल्या कमताईतून आपलें जितकें होतें तितकें, म्हणजे
आपली सर्व उपजीविका टाकिली.

### मंदिराचा नाश व युगाची समाप्ति यांविषयींचें भविष्य

१३ १ मग तो मंदिरांतून निघून जात असतां
त्याच्या एक शिष्य त्याला म्हणाला, गुरुजी, पाहा,
कसे हे धोंडे व कशा या इमारती! २ येशू त्याला
म्हणाला, या मोठ्या इमारती तूं पाहतोस ना? जो पाडला
जाणार नाहीं, असा येथें दगडावर दगड राहणार नाहीं.

३ नंतर तो मंदिरासमोर जैतुनांच्या डोंगरावर बसला
असतां पेत्र, याकोब, योहान व अंद्रिया यांनीं त्याला
एकांतीं विचारिलें, ४ या गोष्टी कधीं होतील आणि या सर्व
गोष्टी पूर्ण होण्याच्या सुमारास आल्या म्हणजे काय चिन्ह
होईल, हें आम्हांस सांगा. ५ येशू त्यांस म्हणूं लागला,
तुम्हांस कोणीं फसवूं नये म्हणून जपा. ६ पुष्कळ लोक
माझ्या नामानें येऊन मीच तो आहें असें म्हणून बहुतांस
फसवितील. ७ आणखी तुम्ही लढायांविषयीं ऐकाल व

लढायांच्या आवया ऐकाल तेव्हां घाबरूं नका; 'असें होणें
अवश्य आहे;' परंतु तेवढ्यांत शेवट होत नाहीं.
८ 'राष्ट्रावर राष्ट्र व राज्यावर राज्य उठेल;' आणि
जागोजागीं भूमिकंप होतील व दुष्काळ पडतील; हा तर
वेदनांचा प्रारंभ होय.

९ तुम्ही आपणांस संभाळा; कारण ते तुम्हांस न्याय-
सभांच्या स्वाधीन करितील, सभास्थानांमध्यें तुम्हांस मार
देतील; आणि सुभेदार व राजे यांस साक्ष व्हावी म्हणून
तुम्हांस माझ्याकरितां त्यांजसमोर उभें राहावें लागेल. १०
प्रथम सर्व राष्ट्रांत सुवार्ता गाजविली पाहिजे. ११ ते
तुम्हांस धरून नेऊन चौकशीकरितां स्वाधीन करितील
तेव्हां आपण काय बोलावें याविषयीं अगोदर चिंता करूं
नका; तर त्या घटकेस जें कांहीं तुम्हांस सुचवून दिलें
जाईल तेंच बोला; कारण बोलणारे तुम्ही नाहीं तर पवित्र
आत्मा आहे. १२ भाऊ भावाला व बाप मुलाला जिवें
मारण्याकरितां धरून देईल; 'मुलें आईबापांवर उठतील'
व त्यांस जिवें मारितील. १३ माझ्या नामामुळें सर्व लोक
तुमचा द्वेष करितील; तरी शेवटपर्यंत टिकून राहणाराच
तेवढा तरेल.

१४ 'ओसाडीचा अमंगळ पदार्थ' जेथें नसावा
तेथें उभा असलेला पाहाल, (वाचणाऱ्यानें हें
ध्यानांत आणावें,) तेव्हां जे यहूदीयांत असतील त्यांनीं
डोंगराकडे पळून जावें; १५ जो धाब्यावर असेल त्यानें
खालीं उतरूं नये अगर आपल्या घरांतून कांहीं घेण्या-
करितां आंत जाऊं नये; १६ शेतांत असेल त्यानें आपलें
वस्त्र नेण्याकरितां माघारें येऊं नये. १७ त्या दिवसांत ज्या
गरोदर व ज्या स्तन पाजणाऱ्या असतील त्यांची अवस्था
अति भयंकर होणार ! १८ तरी हें हिंवाळ्यांत होऊं नये
म्हणून प्रार्थना करा. १९ कारण जी सृष्टि देवानें उत्पन्न
केली 'तिच्या प्रारंभापासून आजपर्यंत झाले नाहींत व
पुढें होणार नाहींत, असे ते दिवस संकटाचे होतील;' २०
आणि ते दिवस प्रभूनें थोडे केले नसते तर कोणाहि मनु-
ष्याचा निभाव लागला नसता. ज्यांस त्यानें निवडलें त्या
निवडलेल्यांसाठीं त्यानें ते दिवस थोडे केले आहेत. २१
त्या वेळेस कोणी तुम्हांस म्हणेल पाहा, ख्रिस्त येथें आहे;
पाहा, तेथें आहे; तर खरें मानूं नका. २२ कारण खोटे
ख्रिस्त व 'खोटे संदेष्टे' होतील, आणि साधेल तर
निवडलेल्यांस देखील फसवावें म्हणून 'चिन्हें व चमत्कार'
दाखवितील. २३ तुम्ही तर सावध राहा; पाहा, मीं
अगोदरच तुम्हांस सर्व सांगून ठेविलें आहे.

२४ हीं संकटें येऊन गेल्यावर त्या दिवसांत 'सूर्य
अंधकारमय होईल आणि चंद्र प्रकाश देणार नाहीं,
२५ आकाशांतून तारे पडतील व आकाशांतील बळें
डळमळतील.' २६ तेव्हां 'मनुष्याच्या पुत्राला' मोठ्या
पराक्रमानें व वैभवानें 'मेघारूढ होऊन येतांना' ते
पाहतील. २७ त्या वेळेस तो देवदूतांस पाठवून पृथ्वीच्या
'सीमेपासून आकाशाच्या सीमेपर्यंत चारी दिशांहून'
आपल्या निवडलेल्यांस 'एकत्र करील.'

## जागृतीची आवश्यकता

२८ आतां अंजिराच्या झाडाचा दाखला घ्या; त्याची
डहाळी कोमल होऊन तिला पानें फुटूं लागलीं म्हणजे
उन्हाळा जवळच आला आहे असें तुम्ही समजतां; २९
तसेंच तुम्ही या गोष्टी होतांना पाहाल तेव्हां तो जवळ
दाराशीं आहे असें समजा. ३० मी तुम्हांस खचीत सांगतों
कीं हें सर्व पूर्ण होईपर्यंत ही पिढी नाहींशी होणार नाहीं;
३१ आकाश व पृथ्वी हीं नाहींतशीं होतील, परंतु माझीं
वचनें नाहींतशीं होणारच नाहींत. ३२ आणखी त्या दिवसा-
विषयीं व त्या घटकेविषयीं कोणाला ठाऊक नाहीं, स्वर्गां-
तील देवदूतांस नाहीं, पुत्रालाहि नाहीं, केवळ पित्याला ठाऊक
आहे. ३३ सावध असा, जागृत राहा; कारण तो समय
केव्हां आहे हें तुम्हांस ठाऊक नाहीं. ३४ प्रवासांत राह-
णाऱ्या कोणीएका मनुष्यानें आपलें घर सोडितांना आपल्या
दासांस अधिकार देऊन ज्याचें त्याला काम नेमून द्यावें व
द्वारपाळासहि जागें राहावयास आज्ञा करावी, त्याप्रमाणें हें
आहे. ३५ यास्तव जागे राहा; कारण घरधनी केव्हां येतो,
संध्याकाळीं, मध्यरात्रीं, कोंबडा आरवण्याच्या वेळीं किंवा
सकाळीं, हें तुम्हांस ठाऊक नाहीं; ३६ नाहीं तर तो अक-
स्मात् येऊन तुम्हांस झोपेंत असतांना पाहील. ३७ जें मी
तुम्हांस सांगतों तें सर्वांस सांगतों. जागृत राहा.

## येशूला ठार मारण्याचा कट

१४ १ मग दोन दिवसांनंतर वल्हांडण व बेखमीर
भाकरींचा सण होता; तेव्हां त्याला कपटानें
कसें धरावें व जिवें मारावें हें मुख्य याजक व
शास्त्री पाहत होते; २ परंतु हें सणांत करूं नये, केलें तर
कदाचित् लोकांमध्यें गडबड होईल, असें त्यांनीं म्हटलें.

## बेथानी येथें येशूला करण्यांत आलेला तैलाभ्यंग

३ तो बेथानी येथें कुष्ठरोगी शिमोन याच्या घरीं
जेवावयाला बसला असतां कोणीएक स्त्री जटामांसीच्या
बहुमूल्य सुगंधी तेलाची अलाबास्त्र कुपी घेऊन आली;
तिनें ती कुपी फोडून त्याच्या मस्तकावर ओतिली. ४
तेव्हां कित्येक आपसांत चडफडून म्हणाले, या सुगंधी
तेलाचा असा नाश कां केला? ५ कारण हें सुगंधी तेल
पाउणशें रुपयांवर विकून ते गोरगरिबांस देतां आले असते
अशी त्यांनीं तिजविषयीं कुरकूर केली. ६ यावर येशू
बोलला, हिला असूं द्या, हिला त्रास कां देतां? हिनें मजसाठीं
एक सत्कृत्य केलें आहे. ७ गोरगरीब नेहमींच तुम्हांजवळ
आहेत, व तुम्हांस पाहिजे तेव्हां त्यांचें बरें करितां येतें;
परंतु मी तुम्हांजवळ नेहमीं आहें असें नाहीं. ८ जें कांहीं
हिच्यानें करवलें तें हिनें केलें; हिनें माझ्या शरीराला उत्तर-
कार्यासाठीं अगोदरच सुगंधद्रव्य लावून ठेविलें आहे. ९ मी
तुम्हांस खचीत सांगतों कीं सर्व जगांत जेथें जेथें सुवार्ता
गाजवितील तेथें तेथें हिनें जें केलें आहे तेंहि हिच्या स्मर-
णार्थ सांगतील.

## यहूदा विश्वासघात करतो

१० मग बारांतील एक जो यहूदा इस्कर्योत तो त्याला
मुख्य याजकांच्या स्वाधीन करण्याकरितां त्यांजकडे निघून
गेला. ११ त्याचें ऐकून त्यांस आनंद झाला, आणि त्याला
त्यांनीं पैका देऊं केला, मग तो त्याला सोईनें धरून
देण्यास संधि पाहूं लागला.

## शेवटलें भोजन

१२ बेखमीर भाकरींच्या सणाच्या पहिल्या दिवशीं
वल्हांडणाचा यज्ञपशु मारीत असत, त्या दिवशीं त्याचे शिष्य
त्याला म्हणाले, आपण वल्हांडणाचें भोजन करावें म्हणून
आम्हीं कोठें जाऊन तयारी करावी अशी आपली इच्छा आहे?
१३ मग त्यानें आपल्या शिष्यांतील दोघांस पाठवितांना
सांगितलें, नगरांत जा, म्हणजे कोणीएक मनुष्य पाण्याचें
मडकें घेऊन जातांना तुम्हांस भेटेल, त्याच्यामागून जा.
१४ तो आंत जाईल तेथल्या घरधन्याला असें सांगा: गुरु
म्हणतो, मीं आपल्या शिष्यांसह वल्हांडणाचें भोजन करावें
अशी माझी उतरावयाची जागा कोठें आहे? १५ मग तो
स्वतः सजविलेली व तयार केलेली एक मोठी माडी तुम्हांस
दाखवील; तेथें आपल्यासाठीं तयारी करा. १६ मग त्याचे
शिष्य निघून नगरांत गेले. तेव्हां त्यानें सांगितल्याप्रमाणेंच
त्यांस आढळलें, आणि त्यांनीं वल्हांडणाची तयारी केली.
१७ मग संध्याकाळ झाल्यावर तो बारा शिष्यांसह
आला; १८ आणि ते बसून भोजन करीत असतां येशू
म्हणाला, मी तुम्हांस खचीत सांगतों कीं तुम्हांपैकीं एक
मला धरून देईल, तो 'मजबरोबर जेवणारा' आहे. १९ ते
खिन्न होऊन एक एक जण त्याला म्हणूं लागला, मी आहें
काय तो? २० त्यानें त्यांस म्हटलें, बारांतील एक मज-
बरोबर ताटांत हात घालीत आहे तो. २१ मनुष्याचा पुत्र,
असें त्याजविषयीं लिहिलें आहे तसा जातो; परंतु ज्याच्या-
कडून मनुष्याचा पुत्र धरून दिला जातो त्या मनुष्याला
धिक्कार असो! तो मनुष्य जन्मला नसता तर तें त्याला
बरें होतें.
२२ ते भोजन करीत असतां त्यानें भाकर घेऊन व
आशीर्वाद देऊन ती मोडिली, आणि त्यांस देऊन म्हटलें,
घ्या, हें माझें शरीर आहे; २३ आणि त्यानें प्याला घेऊन
व ईशोपकारस्मरण करून त्यांस दिला; आणि ते सर्व
त्यांतील प्याले. २४ त्यानें त्यांस म्हटलें, माझें 'हें
कराराचें रक्त' आहे, हें बहुतांकरितां ओतिलें जात आहे.
२५ मी तुम्हांस खचीत सांगतों कीं मी देवाच्या राज्यांत
नवा पिईन त्या दिवसापर्यंत आतांपासून द्राक्षीचा उपज
पिणारच नाहीं.
२६ मग एक स्तोत्र गाऊन ते जैतूनांच्या डोंगराकडे
निघून गेले.

## शिष्य आपल्याला सोडून जातील हें येशूचें भविष्य

२७ नंतर येशू त्यांस म्हणाला, तुम्ही सर्व अडखळाल;

कारण असें लिहिलें आहे कीं ' मी मेंढपाळाला मारीन
आणि मेंढरांची दाणादाण होईल; ' २८ तरी मी उठल्या-
वर तुमच्यापूर्वी गालीलांत जाईन. २९ पेत्र त्याला
म्हणाला, जरी सर्व अडखळले तरी मी अडखळणार नाहीं.
३० येशू त्याला म्हणाला, मी तुला खचीत सांगतों, आज
म्हणजे याच रात्रीं, कोंबडा दोन वेळां आरवण्यापूर्वी तूं
तीन वेळां मला नाकारशील. ३१ तरी तो फार आवेशानें
बोलला, आपल्याबरोबर मला मरावें लागलें तरी मी
आपणाला नाकारणारच नाहीं; सर्वांनीहि तसेंच म्हटलें.

## गेथशेमाने येथें येशूचें आगमन

३२ नंतर ते गेथशेमाने नांवाच्या ठिकाणीं आले, तेव्हां
तो आपल्या शिष्यांस म्हणाला, मी प्रार्थना करीं तोंपर्यंत
येथें बसा. ३३ त्यानें पेत्र, याकोब व योहान यांस
बरोबर घेतलें आणि तो फार चकित व अस्वस्थ होऊं
लागला. ३४ तो त्यांस म्हणाला, ' माझ्या जीवाला '
मरणप्राय ' अति खेद झाला आहे, ' तुम्ही येथें राहा
व जागृत असा. ३५ मग तो कांहींसा पुढें जाऊन भूमीवर
पडला, व त्यानें अशी प्रार्थना केली कीं, होईल तर ही
घटका मजवरून टळून जावी; ३६ आणि तो बोलला, अब्बा,
बापा, तुला सर्व कांहीं साध्य आहे; हा प्याला मजपासून
दूर कर; तरी माझ्या इच्छेप्रमाणें नको, तुझ्या इच्छेप्रमाणें
होवो. ३७ मग तो येऊन पाहतो तों ते झोपीं गेले आहेत;
तेव्हां तो पेत्राला म्हणाला, शिमोना, तूं झोपीं गेलास काय ?
घटकाभरहि तुझ्यानें जागृत राहवलें नाहीं काय ? ३८
तुम्हीं परीक्षेंत पडूं नये म्हणून जागृत राहा व प्रार्थना
करा; आत्मा उत्सुक आहे खरा तरी देह अशक्त आहे.
३९ त्यानें पुनः जाऊन तेच शब्द उच्चारून प्रार्थना केली.
४० मग पुनः येऊन पाहतो तों ते झोपीं गेले आहेत;
त्यांचे डोळे फार जड झाले होते, आणि त्याला काय उत्तर
द्यावें हें त्यांस सुचलें नाहीं. ४१ तो तिसऱ्यानें येऊन
त्यांस म्हणाला, आतां झोप व विसावा घ्या; पुरें झालें;
घटका आली आहे; पाहा, मनुष्याचा पुत्र पापी मनुष्यांच्या
हातीं धरून दिला जात आहे. ४२ उठा, आपण जाऊं;
पाहा, मला धरून देणारा जवळ आला आहे.

## येशूला अटक करण्यांत येते

४३ तो बोलत आहे इतक्यांत बारांतील एक यहूदा
तेथें आला, त्याबरोबर मुख्य याजक, शास्त्री व वडील
यांजकडला लोकसमुदाय तरवारी व सोटे घेऊन आला.
४४ त्याला धरून देणाऱ्यानें तर त्यांस खूण सांगून
ठेविली होती; ती अशी कीं, मी ज्याचें चुंबन घेईन तोच
तो आहे, त्याला धरा व संभाळून न्या. ४५ तो आल्यावर
तत्काळ त्याजकडे गेला आणि, गुरुजी, असें म्हणून त्यानें
त्याचीं पुष्कळ चुंबनें घेतलीं. ४६ मग त्यांनीं त्याजवर
हात टाकून त्याला धरिलें. ४७ जे त्याजजवळ उभे होते
त्यांच्यांतून एकानें तरवार उपसून प्रमुख याजकाच्या
दासावर प्रहार केला व त्याचा कान कापून टाकिला. ४८
तेव्हां येशूनें त्यांस म्हटलें, जसें एकाद्या लुटारूवर तरवारी
व सोटे घेऊन जावें तसें तुम्ही मला धरावयास बाहेर
आलां काय ? ४९ मी प्रतिदिवशीं मंदिरांत शिकवीत
असतां तुम्हांबरोबर असें, पण तुम्हीं मला धरिलें नाहीं;
तरी शास्त्रवचन पूर्ण व्हावें म्हणून हें झालें आहे. ५० मग
सर्व त्याला सोडून पळाले.

५१ त्या प्रसंगीं कोणीएक तरुण उघड्या अंगावर
तागाचें वस्त्र पांघरून त्याच्यामागून चालत होता, त्याला
त्यांनीं धरलें; ५२ परंतु तो तें तागाचें वस्त्र टाकून त्यांज-
पासून उघडाच पळाला.

## मुख्य याजकासमोर येशूची चौकशी

५३ नंतर त्यांनीं येशूला प्रमुख याजकाकडे नेलें;
आणि त्याच्याजवळ सर्व मुख्य याजक, वडील व शास्त्री
जमले. ५४ पेत्र त्याच्यामागून दुरून चालत आंत म्हणजे
प्रमुख याजकाच्या वाड्यांत गेला, आणि कामदारांबरोबर
विस्तवाजवळ त्याच्या उजेडांत शेकत बसला. ५५ मुख्य
याजक व सर्व न्यायसभा यांनीं येशूला जिवें मारण्याकरितां
त्याजविरुद्ध साक्षीचा शोध केला, परंतु ती त्यांस मिळाली
नाहीं. ५६ बहुतांनीं त्याजविरुद्ध खोटी साक्ष दिली, परंतु
त्यांच्या साक्षींत मेळ नव्हता. ५७ कित्येकांनीं उभें राहून
त्याजविरुद्ध अशी खोटी साक्ष दिली कीं ५८ हें हातानें
बांधिलेलें मंदिर मी मोडून टाकीन, व हातानें बांधलें
नाहीं असें दुसरें तीन दिवसांत रचीन, असें आम्हीं

याला बोलतां ऐकलें; ५९ परंतु त्या त्यांच्या
साक्षींतहि मेळ नव्हता. ६० तेव्हां प्रमुख याजकानें
मध्यें उभें राहून येशूला विचारिलें, तूं कांहीं उत्तर
देत नाहींस काय? हे तुझ्याविरुद्ध साक्ष देतात
हें काय? ६१ तथापि तो उगाच राहिला; त्यानें कांहीं
उत्तर दिलें नाहीं. पुनः प्रमुख याजकानें त्याला विचारिलें,
धन्यवादिताचा पुत्र ख्रिस्त तो तूं आहेस काय? ६२
येशूनें म्हटलें, मी आहें; आणि तुम्ही मनुष्याच्या पुत्राला
सर्वसमर्थाच्या उजवीकडे बसलेलें, व आकाशाच्या मेघांसह
येतांना पाहाल. ६३ तेव्हां प्रमुख याजक आपलीं वस्त्रें
फाडून बोलला, आम्हांस साक्षीदारांची आणखी काय
गरज? ६४ हें दुर्भाषण तुम्हीं ऐकलें आहे; तुम्हांला कसें
वाटतें? तेव्हां हा मरणदंडास पात्र आहे, असें सर्वांनीं
ठरविलें. ६५ मग कित्येक त्याजवर थुंकूं लागले, त्याचें तोंड
झाकून व त्याला बुक्या मारून, अंतर्ज्ञानानें बोल, असें
त्याला म्हणूं लागले, आणि कामदारांनीं त्याला चपडाका
मारून आपल्या ताब्यांत घेतलें.

## पेत्र येशूचा इनकार करतो

६६ इकडे पेत्र खालीं वाड्यांत असतां प्रमुख
याजकांच्या दासींपैकीं एक आली; ६७ आणि पेत्र शेक
घेत असतांना पाहून त्याजकडे तिनें दृष्टि लाविली व
म्हटलें, तूंहि येशू नासरेथकर याबरोबर होतास; ६८ परंतु
तो नाकारून बोलला, तूं काय म्हणत्येस तें मला ठाऊक
नाहीं व समजतहि नाहीं. यावर तो बाहेर देवडीवर गेला
इतक्यांत कोंबडा आरवला. ६९ मग ती दासी त्याला
पाहून जे जवळ उभे होते त्यांस पुनः सांगूं लागली कीं हा
त्यांच्यापैकीं आहे. ७० तरी त्यानें पुनः नाकारिलें; मग
कांहीं वेळानें जवळ उभे राहणारे पेत्राला पुनः म्हणाले, तूं
खरोखरच त्यांच्यापैकीं आहेस, कारण तूं गालीली आहेस;
७१ परंतु तो शापोच्चारण करून व शपथा वाहून म्हणूं
लागला, ह्या ज्या मनुष्याविषयीं तुम्ही बोलतां त्याला मी
ओळखीत नाहीं; ७२ तत्क्षणीं दुसऱ्यानें कोंबडा आरवला.
तेव्हां कोंबडा दोन वेळां आरवण्यापूर्वी तूं तीन वेळां मला
नाकारशील, असे जे शब्द येशूनें पेत्राला सांगितले होते ते
त्याला आठवले; आणि त्याविषयीं विचार करून तो रडला.

## रोमी सुभेदार पिलात याच्यासमोर येशू

१५ १ मग पहाट होतांच वडील व शास्त्री यांज-
बरोबर मुख्य याजक व सर्व न्यायसभा यांनीं मसलत
करून येशूला बांधून नेऊन पिलाताच्या स्वाधीन
केलें. २ तेव्हां पिलातानें त्याला विचारिलें, तूं यहूद्यांचा
राजा आहेस काय? त्यानें त्याला उत्तर दिलें, तूं म्हणतोस
तसेंच. ३ मुख्य याजकांनीं त्याजवर पुष्कळ गोष्टींचा आरोप
ठेविला. ४ पिलातानें त्याला पुनः विचारिलें, तूं कांहीं उत्तर
देत नाहींस काय? पाहा, ते किती गोष्टींचा आरोप तुज-
वर ठेवितात. ५ तरी येशूनें आणखी कांहीं उत्तर दिलें
नाहीं; यावरून पिलाताला आश्चर्य वाटलें.
६ सणाच्या दिवसांत ज्या एकाद्या बंदिवानाबद्दल लोक
त्याजकडे मागणी करीत त्यास तो त्यांजकरितां सोडून देत
असे. ७ तेव्हां बंडांतील कित्येक खुनी बंडखोरांबरोबर
बांधून ठेवलेला असा बरब्बा नांवाचा कोणीएक माणूस होता.
८ लोकसमुदाय पुढें येऊन, आम्हांकरितां आपण आपल्या
रिवाजाप्रमाणें करावें, असें त्याजजवळ मागूं लागले. ९
पिलातानें त्यांस उत्तर दिलें, मीं तुम्हांकरितां यहूद्यांच्या
राजाला सोडावें अशी तुमची इच्छा आहे काय? १०
कारण मुख्य याजकांनीं त्याला हेव्यानें धरून दिलें होतें
हें त्याला समजलें होतें; ११ परंतु त्यापेक्षां आम्हांकरितां
बरब्बाला सोडावें असें मागावयास मुख्य याजकांनीं लोक-
समुदायास चेतवलें. १२ तेव्हां पिलातानें त्यांस पुनः
म्हटलें, तर मग ज्याला तुम्ही यहूद्यांचा राजा म्हणतां
त्याचें मीं काय करावें? १३ त्याला वधस्तंभावर खिळा,
अशी त्यांनीं पुनः आरोळी केली. १४ पिलातानें त्यांस
म्हटलें, कां, त्यानें काय वाईट केलें आहे? तरी ते फार
आरडाओरड करून म्हणाले, त्याला वधस्तंभावर खिळा.
१५ तेव्हां लोकसमुदायाला खुश करावें या हेतूनें पिलातानें
बरब्बाला त्यांजकरितां सोडिलें, आणि येशूला फटके मारून
वधस्तंभावर खिळण्याकरितां त्यांच्या स्वाधीन केलें.

## शिपाई येशूची थट्टा करतात

१६ मग शिपायांनीं त्याला प्रयतोर्यमांत म्हणजे कचेरींत
नेलें व त्यांनीं सगळें पलटण एकत्र बोलाविलें. १७ नंतर
त्यांनीं त्याच्या अंगावर जांभळें वस्त्र चढविलें, कांट्यांचा

मुकुट गुंफून त्याला घातला; १८ आणि ते मुजरा करून
त्याला म्हणूं लागले, हे यहूद्यांच्या राजा, तुझा जयजयकार
असो; १९ त्यांनीं त्याच्या मस्तकावर वेतानें मारिलें; ते
त्याजवर थुंकले आणि गुडघे टेकून त्यांनीं त्याला नमन
केलें. २० अशी त्याची थट्टा केल्यावर त्यांनीं जांभळें वस्त्र
त्याच्या अंगावरून काढून त्याचीं वस्त्रें त्याला घातलीं;
आणि वधस्तंभावर खिळण्याकरितां ते त्याला बाहेर
घेऊन गेले.

### येशूला वधस्तंभाला खिळणें

२१ तेव्हां शिमोन नांवाचा कोणीएक कुरेनेकर रानांतून
येऊन जवळून जात असतां त्याला त्यांनीं त्याचा वधस्तंभ
वाहण्याकरितां वेठीस धरिलें; तो अलेक्सांद्र व रूफ यांचा
बाप होता. २२ मग त्यांनीं त्याला गुलगुथा म्हणजे कवटीची
जागा येथें आणिलें, २३ आणि त्याला बोळ मिसळलेला
द्राक्षारस प्यावयास दिला, परंतु त्यानें तो घेतला नाहीं. २४
तेव्हां त्यांनीं त्याला वधस्तंभावर खिळिलें, आणि कोणीं
कोणतें घ्यावें म्हणून 'त्याच्या वस्त्रांवर चिठ्या टाकून तीं
वांटून घेतलीं.' २५ त्यांनीं त्याला वधस्तंभावर खिळिलें
तेव्हां पहिल्या प्रहराचा शेवट होता. २६ त्याच्या दोषा-
रोपाचा लेख **यहूद्यांचा राजा** असा वर लाविला होता.
२७ त्यांनीं त्याच्याबरोबर दोन लुटारू, एक उजवीकडे
व एक डावीकडे असे वधस्तंभावर खिळिले; [ २८ आणि
अपराध्यांत तो गणलेला होता, हा शास्त्रलेख पूर्ण झाला. ]
२९ मग जवळून जाणाऱ्यांनीं 'डोकीं डोलवीत' त्याची
अशी निंदा केली कीं अरे, मंदिर मोडून तीन दिवसांत
बांधणाऱ्या, ३० आपला बचाव कर, वधस्तंभावरून
खालीं ये. ३१ तसेंच मुख्य याजकहि शास्त्र्यांसह आपसांत
थट्टा करीत बोलले, त्यानें दुसऱ्यांचें तारण केलें, त्याला
स्वतःचा बचाव करतां येत नाहीं; ३२ इस्राएलाचा राजा
ख्रिस्त यानें आतां वधस्तंभावरून खालीं यावें म्हणजे तें
पाहून आम्ही विश्वास धरूं. त्याच्याबरोबर वधस्तंभावर
खिळिलेल्या लोकांनींहि त्याची निंदा केली.

### येशूचा मृत्यु

३३ दोन प्रहरापासून तिसऱ्या प्रहरापर्यंत सर्व देशावर
अंधार पडला. ३४ तिसऱ्या प्रहराच्या शेवटीं येशू
मोठ्यानें आरोळी मारून बोलला, 'एलोई, एलोई, लमा
सबक्तनी?' म्हणजे 'माझ्या देवा, माझ्या देवा, तूं
माझा त्याग कां केला?' ३५ तेव्हां जवळ उभे राहणाऱ्यां-
पैकीं कित्येकांनीं हें ऐकून म्हटलें, पाहा, तो एलीयाला
बोलावितो; ३६ आणि एकानें धावत जाऊन स्पंज
'आंबेनें' भरिला आणि तो वेतावर ठेवून त्याला
'प्यावयास देऊन' म्हटलें, असूं द्या; एलीया याला खालीं
उतरावयास येतो किंवा नाहीं हें पाहूं. ३७ मग येशूनें
मोठी आरोळी मारून प्राण सोडिला. ३८ तेव्हां पवित्र-
स्थानांतील पडदा वरपासून खालपर्यंत फाटून दुभागला.
३९ मग त्यानें अशा प्रकारें प्राण सोडिला हें, त्याच्यासमोर
जवळच उभे राहिलेल्या जमादारानें पाहून म्हटलें, खरोखर
हा पुरुष देवाचा पुत्र होता. ४० कांहीं स्त्रियाहि दुरून
पाहत होत्या, त्यांत मग्दालीया मरीया, धाकटा याकोब
व योसे यांची आई मरीया, व सलोमे ह्या होत्या; ४१
तो गालीलांत असतांना त्याच्यामागें चालून त्याची सेवा
ह्या करीत असत; शिवाय त्याच्याबरोबर यरुशलेमास
आलेल्या दुसऱ्या पुष्कळ स्त्रिया होत्या.

### येशूला खडकांत खोदिलेल्या कबरेंत ठेवतात

४२ ह्या सुमारास संध्याकाळ झाली, आणि हा तयारीचा
दिवस म्हणजे शब्बाथाच्या पूर्वीचा दिवस होता; ४३
म्हणून अरिमथाईकर योसेफानें धैर्य करून पिलाताकडे आंत
जाऊन येशूचें शरीर मागितलें; हा एक प्रतिष्ठित मंत्री
असून स्वतः देवाच्या राज्याची प्रतीक्षा करीत होता. ४४
तेव्हां तो इतक्यांत कसा मेला ह्याचें पिलाताला नवल
वाटलें; आणि त्यानें जमादाराला बोलावून त्याला विचारिलें,
याला मरून कांहीं वेळ झाला काय? ४५ जमादाराकडून
तें कळल्यावर त्यानें योसेफाला प्रेत दिलें. ४६ त्यानें
तागाचें वस्त्र विकत आणिलें व त्याला खालीं काढून त्या
तागाच्या वस्त्रानें गुंडाळिलें; मग त्याला खडकांत खोदि-
लेल्या कबरेंत ठेविलें, व कबरेच्या तोंडावर धोंड लोटून
लाविली. ४७ त्याला कोठें ठेविलें होतें हें मग्दालीया
मरीया व योसेची आई मरीया यांनीं पाहिलें.

## येशूचें पुनरुत्थान

१ नंतर शब्बाथ गेल्यावर मग्दालीया मरीया,
१६ याकोबाची आई मरीया व सलोमे यांनीं, तिकडे
जाऊन त्याला लावण्याकरितां, सुगंधद्रव्यें विकत
घेतलीं; २ आणि आठवड्याच्या पहिल्या दिवशीं मोठ्या
प्रातःकाळीं सूर्योदयाच्या समयीं त्या कबरेजवळ आल्या.
३ तेव्हां त्या एकमेकींस म्हणत होत्या, कबरेच्या तोंडा-
वरील धोंड आपल्याकरितां कोण लोटील ? ४ त्यांनीं वर
पाहिलें तों धोंड एकीकडे लोटलेली आहे असें त्यांच्या
दृष्टीस पडलें; ती फार मोठी होती. ५ मग कबरेंत गेल्यावर
पांढरा झगा ल्यालेल्या अशा एका तरुणाला उजव्या बाजूस
बसलेलें पाहून त्या चकित झाल्या. ६ तो त्यांस म्हणाला,
चकित होऊं नका; वधस्तंभावर खिळिलेल्या येशू नासरेथ-
कराचा शोध तुम्ही करीत आहां; तो उठला आहे, येथें
नाहीं; त्याला ठेविलें होतें ती ही जागा पाहा. ७ जा; त्याच्या
शिष्यांस व पेत्राला सांगा कीं तो तुमच्यापूर्वी गालीलांत
जात आहे; त्यानें तुम्हांला सांगितल्याप्रमाणें तो तेथें
तुमच्या दृष्टीस पडेल. ८ मग त्या बाहेर निघून कंपायमान
व विस्मित होत्सात्या कबरेपासून पळाल्या; त्यांनीं कोणाला
कांहीं सांगितलें नाहीं; कारण त्या भयभीत झाल्या होत्या.
[ ९ आठवड्याच्या पहिल्या दिवशीं प्रातःकाळीं तो
उठल्यावर, ज्या मग्दालीया मरीयेंतून त्यानें सात भूतें
काढिलीं होतीं तिला त्यानें प्रथम दर्शन दिलें. १० तिनें
जाऊन हें वर्तमान त्याजबरोबर पूर्वी असलेल्या आणि
शोक करीत व रडत असलेल्या लोकांना सांगितलें. ११
आतां तो जीवंत आहे व तिच्या दृष्टीस पडला, हें ऐकून
त्यांनीं त्या गोष्टींवर विश्वास ठेविला नाहीं.

१२ यानंतर त्यांतील दोघे जण बाहेरगांवीं चालले
असतां, त्यांस तो दुसऱ्या रूपानें प्रगट झाला. १३ त्यांनीं
जाऊन बरकडांस सांगितलें तरी त्यांनीं त्यांजवरहि विश्वास
ठेविला नाहीं.

१४ नंतर अकरा जण जेवावयास बसले असतां
त्यांसहि तो प्रगट झाला; आणि ज्यांनीं त्याला उठल्यावर
पाहिलें होतें त्यांजवर त्यांनीं विश्वास ठेविला नाहीं म्हणून
त्यानें त्यांचा अविश्वास व अंतःकरणाचें काठिण्य यांविषयीं
त्यांस दोष लाविला. १५ त्यानें त्यांस सांगितलें कीं सर्व
जगांत जाऊन संपूर्ण सृष्टीला सुवार्तेची घोषणा करा;
१६ जो विश्वास धरितो व बाप्तिस्मा घेतो त्याचें तारण
होईल; जो विश्वास धरीत नाहीं तो दंडास योग्य ठरेल; १७
आणि विश्वास धरणाऱ्यांबरोबर हीं चिन्हें असत जातील;
ते माझ्या नामानें भूतें काढतील; नव्यानव्या भाषा
बोलतील; १८ सर्प उचलतील, व कोणताहि प्राणघातक
पदार्थ प्याले तरी तो त्यांस बाधणारच नाहीं; त्यांनीं
दुखणाइतांवर हात ठेविले म्हणजे ते बरे होतील.

१९ याप्रमाणें प्रभु येशू त्यांजबरोबर बोलल्यानंतर वर
स्वर्गांत घेतला गेला, आणि देवाच्या उजवीकडे बसला.
२० त्यांनीं निघून जाऊन, प्रभु त्यांसह कार्य करीत असतां,
आणि त्यांजबरोबर असणाऱ्या चिन्हांच्या द्वारा वचन दृढ
करीत असतां, सर्वत्र घोषणा केली. आमेन. ]

---

# लूककृत शुभवर्तमान

### प्रस्तावना

१ आम्हांमध्यें ज्या गोष्टींसंबंधानें पूर्ण खातरी झाली
१ आहे त्या आरंभापासून प्रत्यक्ष पाहणारे लोक व वच-
नाचे सेवक होते, २ त्यांनीं आम्हांस सांगून ठेविलेला
वृत्तांत लिहून काढण्याचें काम बहुतांनीं हातीं घेतलें आहे;
३ यास्तव थियफिला महाराज, मलाहि वाटलें कीं सर्व
गोष्टींचा मुळापासून नीट शोध करून त्या आपणाला
अनुक्रमानें लिहाव्या; ४ यासाठीं कीं ज्या वचनांचें शिक्षण
आपणाला देण्यांत आलें आहे, त्यांचा निश्चितपणा आपल्या
लक्षांत यावा.

## बाप्तिस्मा करणाऱ्या योहानाच्या जन्माचें भविष्य

५ यहूदीयाचा राजा हेरोद याच्या दिवसांत
अबीयाच्या वर्गांतील जखऱ्या नांवाचा कोणी याजक होता;
त्याची बायको अहरोनाच्या कुळांतील असून तिचें नांव
अलीशिबा होतें; ६ तीं उभयतां देवाच्या दृष्टीनें धार्मिक
होतीं; आणि प्रभूच्या सर्व आज्ञा व विधि निर्दोषतेनें
अनुसरणारीं होतीं. ७ अलीशिबा वांझ असल्यामुळें त्यांस
मूलबाळ नव्हतें; तीं उभयतां वयातीतहि झालीं होतीं.

८ एकदा असें झालें कीं तो आपल्या वर्गाच्या
अनुक्रमानें देवापुढें याज्ञिकी करीत असतां, ९ याज्ञिकीच्या
परिपाठप्रमाणें प्रभूच्या पवित्रस्थानांत जाऊन धूप
जाळण्याची त्याची पाळी आली. १० धूप जाळण्याच्या
वेळेस लोकांचा सर्व समुदाय बाहेर प्रार्थना करीत होता.
११ तेव्हां प्रभूचा दूत धूपवेदीच्या उजव्या बाजूस उभा
राहिलेला त्याच्या दृष्टीस पडला. १२ त्याला पाहून
जखऱ्या घाबरला व भयभीत झाला. १३ देवदूतानें त्याला
म्हटलें, जखऱ्या, भिऊं नको, कारण तुझी विनंति
ऐकण्यांत आली आहे; तुझी बायको अलीशिबा हिजपासून
तुला मुलगा होईल, आणि तूं त्याचें नांव योहान ठेव. १४
तुला आनंद व उल्लास होईल, आणि त्याच्या जन्मानें
पुष्कळ लोकांस आनंद वाटेल.

१५ तो प्रभूच्या दिसण्यांत महान् होईल, 'द्राक्षारस
व मद्य प्राशन करणार नाहीं,' आणि आपल्या मातेच्या
उदरापासून पवित्र आत्म्यानें परिपूर्ण असेल. १६ तो
इस्राएलाच्या संतानांतील बहुतांस त्यांचा देव प्रभु याजकडे
वळवील; १७ 'बापांचीं अंतःकरणें मुलांकडे,' व हट्टी
लोकांस धार्मिक जनांच्या ज्ञानाकडे फिरवून प्रभूसाठीं
योग्य प्रजा तयार करावी म्हणून तो 'एलीयाच्या'
आत्म्यानें व सामर्थ्यानें त्याच्यापुढें चालेल. १८ तेव्हां
जखऱ्या देवदूताला म्हणाला, हें कशावरून समजूं ? कारण
मी म्हातारा आहें व माझी बायकोहि वयातीत आहे.
१९ देवदूतानें त्याला उत्तर दिलें, मी देवाच्यापुढें उभा
राहणारा गब्रीएल आहें, आणि तुजबरोबर बोलावयास व
ही सुवार्ता तुला कळवावयास मला पाठविण्यांत आलें आहे.
२० पाहा, हें घडेल त्या दिवसापर्यंत तूं मुका राहशील,
तुझ्यानें बोलवणार नाहीं; कारण यथाकालीं पूर्ण होणाऱ्या
माझ्या वचनांवर तूं विश्वास ठेविला नाहीं. २१ इकडे
लोक जखऱ्याची वाट पाहत होते, व त्याला पवित्रस्थानांत
उशीर लागल्यामुळें त्यांना आश्चर्य वाटलें. २२ तो बाहेर
आल्यावर त्याला त्यांजबरोबर बोलतां येईना; तेव्हां,
त्याला पवित्रस्थानांत दर्शन झालें आहे असें ते समजले;
तो त्यांस खुणावूं लागून गप्प राहिला. २३ मग असें झालें
कीं त्याच्या सेवेचे दिवस पूर्ण झाल्यावर तो आपल्या
घरीं गेला.

२४ त्या दिवसांनंतर त्याची बायको अलीशिबा गरोदर
राहिली; आणि पांच महिने लपून राहिली; २५ ती म्हणत
असे कीं लोकांतील माझी निंदा दूर करण्यासाठीं प्रभूनें
मजकडे पाहिलें तेव्हां मजसाठीं त्यानें असें केलें.

## कुमारी मरीयेला देवदूताचा निरोप

२६ नंतर सहाव्या महिन्यांत देवानें गालीलांतील
नासरेथ नामें नगरास एका कुमारीकडे गब्रीएल देवदूताला
पाठविलें. २७ ती दाविदाच्या घराण्यांतील योसेफ नामें
पुरुषाला वाग्दत्त होती; त्या कुमारीचें नांव मरीया होतें.
२८ तेव्हां देवदूत आंत तिजकडे येऊन म्हणाला, हे कृपा
पावलेल्ये, कल्याण; प्रभु तुजबरोबर असो; [ स्त्रियांमध्यें
तूं धन्य आहेस. ] २९ ती त्या बोलण्यानें फार घाबरली,
आणि हें अभिवंदन काय असेल असा विचार करूं लागली.
३० देवदूतानें तिला म्हटलें, मरीये, भिऊं नको, कारण
देवाची कृपा तुजवर झाली आहे; ३१ पाहा तूं गरोदर
होशील व पुत्र प्रसवशील; त्याचें नांव येशू ठेव; ३२ तो
थोर होईल व त्याला परात्पराचा पुत्र म्हणतील; आणि
प्रभु देव त्याला त्याचा बाप 'दावीद याचें राजासन'
देईल; ३३ तो याकोबाच्या घराण्यावर 'युगानुयुग राज्य
करील,' त्याच्या राज्याचा अंत होणार नाहीं. ३४ मरीयेनें
देवदूताला म्हटलें, हें कसें होईल ? कारण मला पुरुष
ठाऊक नाहीं. ३५ देवदूतानें उत्तर दिलें, पवित्र आत्मा
तुजवर येईल, आणि परात्पराची शक्ति तुजवर छाया
करील; याकरितां, जो जन्मेल त्याला पवित्र, देवाचा पुत्र,
असें म्हणतील. ३६ पाहा, तुझी नातलग अलीशिबा

इलाहि म्हातारपणीं पुत्रगर्भ राहिला आहे, आणि जिला
वांझ म्हणत तिला हा सहावा महिना आहे; ३७ 'देवाचें
कोणतेंहि वचन असमर्थ होईल असें नाहीं.' ३८ तेव्हां
मरीया म्हणाली, पाहा, मी प्रभूची दासी; मला तुझ्या
वचनाप्रमाणें होवो. मग देवदूत तिजपासून निघून गेला.

## मरीया अलीशिबेला भेटते

३९ त्याच दिवसांत मरीया त्वरा करून डोंगराळ
प्रदेशांतील यहूदाच्या एका नगरांत निघून गेली; ४०
आणि जखऱ्याच्या घरांत जाऊन तिनें अलीशिबेला
अभिवंदन केलें. ४१ तेव्हां असें झालें कीं अलीशिबेनें
मरीयेचें अभिवंदन ऐकतांच बाळकानें तिच्या उदरांत
उडी मारली, व अलीशिबा पवित्र आत्म्यानें परिपूर्ण झाली;
४२ आणि ती उच्च स्वर काढून मोठ्यानें बोलली, स्त्रियां-
मध्यें तूं धन्य व तुझ्या पोटचें फळ धन्य. ४३ माझ्या
प्रभूच्या मातेनें मजकडे यावें हें मला कोठून? ४४ पाहा,
तुझ्या अभिवंदनाची वाणी माझ्या कानीं पडतांच बाळकानें
माझ्या उदरांत उल्हासानें उडी मारिली; ४५ जिनें विश्वास
धरिला ती धन्य, कारण प्रभूनें तिला सांगितलेल्या गोष्टींची
पूर्णता होईल.

## मरीयेचें स्तुतिगायन

४६ तेव्हां मरीया म्हणाली :
'माझा जीव प्रभूला' थोर मानितो,
४७ आणि 'देव जो माझा तारणारा'
त्याजमुळें माझा आत्मा 'उल्लासला आहे;'
४८ कारण 'त्यानें आपल्या दासीच्या दैन्यावस्थेचें
अवलोकन केलें आहे;' पाहा, आतांपासून सर्व
पिढ्या मला धन्य म्हणतील;
४९ कारण जो पराक्रमी त्यानें माझ्याकरितां महत्कृत्यें
केलीं आहेत; 'त्याचें नाम पवित्र आहे.'
५० जे 'त्याचें भय धरितात,
त्यांजवर त्याची दया पिढ्यानपिढी आहे.'
५१ त्यानें आपल्या 'बाहूनें' पराक्रम केला आहे;
त्यानें 'गर्विष्ठांची' त्यांच्याच अंतःकरणाच्या
कल्पनेनें 'दाणादाण केली आहे.'
५२ 'त्यानें अधिपतींस' राजासनांवरून 'काढिलें आहे,'
व 'दीनांस उंच केलें आहे.'
५३ 'भुकेल्यांस त्यानें उत्तम पदार्थांनीं तृप्त केलें आहे,'
व 'धनवानांस रिकामें लावून दिलें आहे.'
५४ 'त्यानें आमच्या पूर्वजांस सांगितल्याप्रमाणें
अब्राहाम व त्याचें संतान
यांजवरील दया सर्वकाळ स्मरून
५५ आपला सेवक इस्राएल याला साहाय्य केलें आहे.'
५६ नंतर मरीया सुमारें तीन महिने तिच्याजवळ राहून
आपल्या घरास माघारें गेली.

## बाप्तिस्मा करणाऱ्या योहानाचा जन्म

५७ अलीशिबेच्या प्रसूतीचे दिवस भरून तिला मुलगा
झाला. ५८ प्रभूनें तिजवर मोठी दया केली हें ऐकून तिचे
शेजारी व नातलग यांनीं तिच्याबरोबर आनंद केला. ५९
मग आठव्या दिवशीं असें झालें कीं बाळकाची सुंता करा-
वयास ते आले, आणि त्याच्या बापाच्या नांवावरून त्याचें
नांव जखऱ्या ठेवणार होते; ६० परंतु त्याच्या आईनें
म्हटलें, असें नाहीं; याला योहान म्हणावयाचें आहे. ६१
ते तिला म्हणाले, या नांवाचा तुझ्या नातलगांत कोणी
नाहीं. ६२ नंतर आपल्या मनांत ह्याचें कोणतें नांव ठेवाव-
याचें आहे, असें त्यांनीं त्याच्या बापाला खुणेनें विचारिलें.
६३ तेव्हां त्यानें पाटी मागवून ह्याचें नांव योहान आहे
असें लिहिलें. तेव्हां सर्वांस आश्चर्य वाटलें. ६४ मग
तत्क्षणीं त्याचें तोंड उघडलें, त्याची जीभ मोकळी झाली
व तो देवाचा धन्यवाद करीत बोलूं लागला. ६५ ह्यावरून
त्यांच्यासभोंवतीं राहणाऱ्या सर्वांस भय प्राप्त झालें; आणि
यहूदीयाच्या अवघ्या डोंगराळ प्रदेशांत या सर्व गोष्टींविषयीं
लोक बोलूं लागले. ६६ ऐकणाऱ्या सर्वांनीं ह्या गोष्टी
आपल्या अंतःकरणांत ठेवून म्हटलें, हा बाळक होणार तरी
कसा? कारण प्रभूचा हात त्याजबरोबर होता.

## जखऱ्याचें स्तुतिगायन

६७ त्याचा बाप जखऱ्या ह्यानें पवित्र आत्म्यानें परि-
पूर्ण होऊन संदेश दिला, तो असा :
६८ इस्राएलाचा देव प्रभु धन्यवादित असो;
कारण त्यानें 'आपल्या लोकांची' भेट घेऊन
त्यांस 'मुक्ति' दिली आहे;

६९-७० ( आपले जे पवित्र संदेष्टे आरंभापासून होते
त्यांच्या मुखानें त्यानें सांगितल्याप्रमाणें )
आपला दास 'दावीद' याच्या घराण्यांत
त्यानें आम्हांसाठीं तारणाचें 'शिंग उत्पन्न केलें
आहे;'
७१ म्हणजे 'आमच्या शत्रूंपासून तारण व आमचा
द्वेष करणाऱ्या सर्वांच्या हातांतून सुटका;'
७२ यासाठीं कीं त्यानें 'आमच्या पूर्वजांवर' दया करावी,
आणि 'आपला' पवित्र 'करार,
७३ म्हणजे जी शपथ त्यानें आमचा बाप अब्राहाम
याजशीं वाहिली ती स्मरावी;'
७४ ती अशी कीं तुम्ही आपल्या शत्रूंच्या हातांतून
सुटून
७५ माझ्यासमोर पवित्रतेनें व धार्मिकतेनें आयुष्यभर
माझी सेवा निर्भयपणें कराल, असें मी करीन.
७६ आणि हे बाळका, तुला परात्पराचा संदेष्टा म्हण-
तील, कारण 'प्रभूचे मार्ग, सिद्ध करण्याकरितां तूं
त्याजपुढें' चालशील,
७७ यासाठीं कीं त्याच्या लोकांस त्यांच्या पापक्षमेनें
तारणाचें ज्ञान द्यावें.
७८ आमच्या देवाच्या परम दयेनें हें झालें आहे;
त्याच्या योगें उदयप्रभा वरून आमची भेट घेईल;
७९ 'यासाठीं कीं अंधारांत व मृत्युच्छायेंत बसलेल्यांस
प्रकाश देण्यास यावा' आणि आमचे पाय
शांतीच्या मार्गीं लावावे.
८० तो बाळक वाढून आत्म्यानें बलवान् होत गेला,
आणि इस्राएलास प्रगट व्हावयाच्या दिवसापर्यंत अरण्यांत
राहिला.

### येशूचा जन्म

१ त्या दिवसांत असें झालें कीं सर्व जगाची नांव-
२ निशी लिहावी अशी कैसर औगुस्त याची आज्ञा झाली.
२ कीरीनिय हा सूरिया प्रांताचा सुभेदार असतां ही
पहिली नांवनिशी झाली. ३ तेव्हां सर्व लोक आपआपल्या
गांवीं नांवनिशी लिहून द्यावयास गेले. ४ योसेफहि आपणास
वाग्दत्त झालेली मरीया गरोदर असतां तिजसहित नांव-
निशी लिहून द्यावयास ५ गालीलांतील नासरेथ गांवाहून
यहूदियांतील बेथलहेम नामें दाविदाच्या गांवीं वर गेला;
कारण तो दाविदाच्या घराण्यांतला व गोत्रांतला होता. ६
ती तेथें असतां असें झालें कीं, तिचे प्रसूतीचे दिवस भरले;
७ आणि ती आपला प्रथमपुत्र प्रसवली; त्याला तिनें
बाळत्यानें गुंडाळून गव्हाणींत निजविलें, कारण त्यांस
उतारशाळेंत जागा नव्हती.

८ त्याच प्रांतांत मेंढपाळ रानांत राहून रात्रीं आपले
कळप राखीत होते. ९ तेव्हां प्रभूचा दूत त्यांच्याजवळ
उभा राहिला; प्रभूचें तेज त्यांच्याभोंवतें प्रकाशलें आणि ते
भयभीत झाले. १० तेव्हां देवदूत त्यांस म्हणाला, भिऊं
नका; कारण पाहा, जो मोठा आनंद सर्व लोकांस होणार
आहे त्याची सुवार्ता मी तुम्हांस सांगतों; ११ ती ही कीं
तुम्हांसाठीं आज दाविदाच्या गांवांत तारणारा जन्मला आहे,
तो ख्रिस्त प्रभु आहे; १२ आणि तुम्हांस खूण हीच कीं
बाळत्यानें गुंडाळलेलें व गव्हाणींत निजविलेलें असें बाळक
तुम्हांस आढळेल. १३ इतक्यांत अकस्मात् स्वर्गांतील
सैन्याचा समुदाय त्या देवदूताजवळ प्रगट झाला; ते
देवाची स्तुति करीत म्हणाले,

१४ ऊर्ध्वलोकीं देवाला गौरव,
आणि पृथ्वीवर मनुष्यांत शांति;
त्यांजवर त्याचा प्रसाद झाला आहे.

१५ मग असें झालें कीं देवदूत त्यांजपासून स्वर्गास
गेले, तेव्हां मेंढपाळ एकमेकांस म्हणाले, चला, आपण
बेथलहेमापर्यंत जाऊं, व झालेली जी ही गोष्ट प्रभूनें
आपल्याला कळविली ती पाहूं. १६ तेव्हां ते घाईघाईनें
गेले तों मरीया, योसेफ व गव्हाणींत निजविलेलें बाळक
हीं त्यांस आढळलीं. १७ त्यांनीं त्यांस पाहिल्यावर त्या
बाळकाविषयीं देवदूतानें जी गोष्ट त्यांस सांगितली होती
ती त्यांनीं कळविली. १८ मग सर्व ऐकणाऱ्यांनीं त्या
मेंढपाळांनीं सांगितलेल्या गोष्टींविषयीं आश्चर्य केलें; १९
परंतु मरीयेनें या सर्व गोष्टींचें मनन करून त्या आपल्या
अंतःकरणांत ठेविल्या. २० नंतर मेंढपाळांस सांगण्यांत आलें
होतें त्याप्रमाणें त्या सर्व गोष्टी त्यांनीं ऐकल्या व पाहिल्या;
यामुळें ते देवाचें गौरव करीत माघारे गेले.

२१ मग सुंतेचा आठवा दिवस आल्यावर त्याचें नांव येशू ठेविलें; हें तर तो उदरांत संभवण्यापूर्वीच देवदूतानें ठेविलें होतें.

## मंदिरांत येशूला सादर करणें

२२ पुढें मोशाच्या नियमशास्त्राप्रमाणें त्यांचे 'शुद्धीकरणाचे दिवस भरल्यावर' २३ ('प्रत्येक प्रथम जन्मलेला नर प्रभूसाठीं पवित्र म्हणावा' असें जें प्रभूच्या नियमशास्त्रांत लिहिलें आहे त्याप्रमाणें) त्याचें प्रभूला समर्पण करावें, २४ आणि प्रभूच्या नियमशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें 'होल्यांचा जोडा किंवा पारव्यांचीं दोन पिलें' यांचा यज्ञ करावा, म्हणून त्यांनीं त्याला यरुशलेमास आणिलें.

## शिमोन व त्याचें हर्षस्तोत्र

२५ तेव्हां पाहा, शिमोन नांवाचा कोणीएक मनुष्य यरुशलेमांत होता; तो धार्मिक व भक्तिमान् मनुष्य असून इस्राएलाच्या सांत्वनाची वाट पाहत असे, व त्याजवर पवित्र आत्मा होता. २६ प्रभूच्या ख्रिस्ताला पाहिल्यापूर्वीं तुला मरण येणार नाहीं असें पवित्र आत्म्यानें त्याला प्रगट केलें होतें. २७ तो आत्मयुक्त असतां मंदिरांत आला; आणि नियमशास्त्राच्या विधीप्रमाणें करविण्याकरितां आईबापांनीं त्या येशू बाळकाला आंत आणिलें, २८ तेव्हां त्यानें त्याला हातांवर घेऊन देवाचा धन्यवाद करून म्हटलें:

२९ हे प्रभू, आतां तूं आपल्या वचनाप्रमाणें
आपल्या दासाला शांतीनें जाऊं देतोस;
३० कारण 'विदेश्यांस प्रकटीकरण होण्यासाठीं उजेड'
३१ व तुझ्या 'इस्राएल लोकांचें वैभव
असें जें तुझें तारण
३२ तूं सर्व राष्ट्रांसमक्ष सिद्ध केलें,'
तें मीं आपल्या डोळ्यांनीं 'पाहिलें आहे;'

३३ त्याजविषयीं हें जें वदण्यांत आलें त्यावरून त्याचा बाप व त्याची आई यांस आश्चर्य वाटलें. ३४ शिमोनानें त्यांस आशीर्वाद दिला व त्याची आई मरीया इला म्हटलें, पाहा, इस्राएलांत बहुतांचें पतन व उत्थान यांसाठीं आणि ज्याच्याविरुद्ध लोक बोलतील असलें चिन्ह होण्यासाठीं ह्याला ठेविलें आहे; ३५ आणखी पुष्कळ लोकांच्या अंत:करणांतील विचार उघडकीस यावे म्हणून तुझ्या स्वत:च्या जिवांत तरवार भोसकून जाईल.

## संदेष्ट्री हन्ना

३६ आशेराच्या वंशांतील फनूएलाची कन्या हन्ना नांवाची एक संदेष्ट्री होती; ती फार वयोवृद्ध झाली असून कुंवारपण संपल्यापासून नवऱ्याजवळ सात वर्षें राहिली होती. ३७ आतां ती चौऱ्याशीं वर्षांची विधवा असून मंदिर सोडून न जातां उपास व प्रार्थना यांच्या द्वारें रात्रंदिवस सेवा करीत असे. ३८ तिनें त्याच समयीं जवळ येऊन देवापुढें आभारप्रदर्शन केलें, व जे यरुशलेमाच्या मुक्ततेची वाट पाहत होते त्या सर्वांस त्याजविषयीं सांगितलें.

## येशूचें बाळपण

३९ नंतर प्रभूच्या नियमशास्त्राप्रमाणें सर्व समाप्त करून गालीलांत आपलें गांव नासरेथ येथें तीं परत गेलीं.

४० तो बाळक वाढीस लागला आणि ज्ञानानें पूर्ण होत असतां बलवान् झाला; त्याजवर देवाची कृपा होती.

४१ त्याचीं आईबापें प्रतिवर्षी वल्हांडण सणांत यरुशलेमास जात असत; ४२ आणि तो बारा वर्षांचा झाला तेव्हां तीं त्या सणांतील रिवाजाप्रमाणें तेथें गेलीं. ४३ मग सणाचे दिवस संपल्यावर तीं माघारीं गेलीं, तेव्हां तो मुलगा येशू यरुशलेमांत मागें राहिला हें त्याच्या आईबापांस कळलें नाहीं. ४४ तो वाटेच्या सोबत्यांत असेल असें समजून तीं एक दिवसाची वाट चालून गेलीं; नंतर नातलग व ओळखीचे यांजमध्यें त्यांनीं त्याचा शोध केला; ४५ परंतु तो त्यांस सांपडला नाहीं, म्हणून तीं त्याचा शोध करीत करीत यरुशलेमास माघारीं गेलीं. ४६ मग असें झालें कीं तीन दिवसांनंतर तो मंदिरांत गुरुमंडळामध्यें बसून त्यांचें भाषण ऐकतांना व त्यांस प्रश्न करितांना त्यांस आढळला. ४७ त्याचे सर्व श्रोतेजन त्याच्या बुद्धीवरून व उत्तरावरून थक्क झाले. ४८ तेव्हां त्याला पाहून त्यांना आश्चर्य वाटलें, आणि त्याची आई त्याला म्हणाली, बाळा, तूं आम्हांबरोबर असा कां वागलास? पाहा, तुझा बाप व मी कष्टी होऊन तुझा शोध करीत आलों. ४९ तो त्यांस म्हणाला, तुम्हीं माझा शोध केला हें कसें? जें माझ्या

बापाचें त्यांत मीं असावें हें तुमच्या ध्यानांत आलें नाहीं
काय? ५० परंतु तो जे हे शब्द बोलला ते तीं समजलीं
नाहींत. ५१ मग तो त्यांच्याबरोबर निघून नासरेथास गेला
व त्यांच्या आज्ञेंत राहिला; त्याच्या आईनें या सर्व गोष्टी
आपल्य मनांत ठेविल्या.

५२ येशू हा ज्ञानानें, शरीरानें आणि 'देवाच्या व
मनुष्याच्या कृपेंत वाढत गेला.'

## बाप्तिस्मा करणारा योहान व त्याचा संदेश

३ १ मग तिबिर्य कैसर याच्या राज्याच्या पंधराव्या
वर्षी पंतय पिलात यहूदीयाचा अधिकारी होता; हेरोद
गालीलाचा मांडलिक; त्याचा भाऊ फिलिप्प हा इतु-
रीया व त्राखोनीती या देशांचा मांडलिक; आणि लुसनिय
अबिलेनेचा मांडलिक होता; २ हन्ना व कयफा हे प्रमुख
याजक होते; तेव्हां जखऱ्याचा पुत्र योहान याला अरण्यांत
देवाचें वचन प्राप्त झालें. ३ मग तो यार्देनेच्या बाहूंकडील
सगळ्या प्रदेशांत पापक्षमेसाठीं पश्चात्तापाचा बाप्तिस्मा
गाजवीत फिरला.

४ अरण्यांत घोषणा करणाऱ्याची वाणी अशी झाली कीं

प्रभूचा मार्ग सिद्ध करा,
त्याच्या वाटा नीट करा;
५ प्रत्येक खोरें भरेल,
प्रत्येक डोंगर व टेकडी सखल होईल,
वांकडीं सरळ होतील,
खडकाळींच्या वाटा सपाट होतील;

६ आणि सर्व मनुष्यें देवानें केलेलें तारण पाहतील;
असें जें यशया संदेष्टा याच्या पुस्तकांत लिहिलें आहे
त्याप्रमाणें हें झालें.

७ तेव्हां जे लोकसमुदाय त्याजपासून बाप्तिस्मा घ्याव-
यास त्याकडे निघून आले त्यांस तो म्हणाला, अहो सापांच्या
पिलांनो, भावी क्रोधापासून पळावयास तुम्हांस कोणीं
सुचविलें? ८ आतां पश्चात्तापास योग्य अशीं फळें द्या;
आणि अब्राहाम आमचा बाप आहे असें आपल्या मनांत
म्हणूं लागूं नका. मी तुम्हांस सांगतों, देव अब्राहामासाठीं
या दगडांपासून संतति उत्पन्न करावयास समर्थ आहे. ९
आतांच झाडांच्या मुळाशीं कुऱ्हाड ठेविलेली आहे; जें जें
झाड चांगलें फळ देत नाहीं तें तें तोडून अग्नींत टाकण्यांत
येतें. १० तेव्हां लोकसमुदायांनीं त्याला विचारिलें, तर
आम्हीं काय करावें? ११ त्यानें त्यांस उत्तर दिलें, ज्याच्या-
जवळ दोन अंगरखे आहेत त्यानें, ज्याला तो नाहीं त्याला
द्यावा, आणि ज्याच्याजवळ अन्न आहे त्यानें तसेंच करावें.
१२ मग जकातदारहि बाप्तिस्मा घ्यावयास आले व त्याला
म्हणाले, गुरुजी, आम्हीं काय करावें? १३ त्यानें त्यांस
म्हटलें, तुम्हांस जें नेमिलें आहे त्याहून कांहीं अधिक जुल-
मानें घेऊं नका. १४ शिपायांनींहि त्याला विचारिलें, आम्ही
काय करावें? त्यानें त्यांस सांगितलें, कोणावर बलात्कार
करूं नका, व कुभांडानें कांहीं घेऊं नका; आपल्या पगारांत
तृप्त असा.

१५ तेव्हां लोक वाट पाहत असतां व हाच ख्रिस्त
नसेलना असा सर्व जण योहानाविषयीं आपल्या मनांत
विचार करीत असतां, १६ योहानानें त्या सर्वांस उत्तर
दिलें, मी तुमचा बाप्तिस्मा पाण्यानें करितों खरें, परंतु
मजपेक्षां जो समर्थ आहे, ज्याच्या वाहणांचा बंद सोडा-
वयास मी योग्य नाहीं, तो येत आहे; तो तुमचा बाप्तिस्मा
पवित्र आत्म्यानें व अग्नीनें करील. १७ आपलें खळें
अगदीं स्वच्छ करण्यास व गहूं आपल्या कोठारांत सांठवि-
ण्यास त्याच्या हातांत त्याचें सूप आहे; तो न विझणाऱ्या
अग्नींत भूस जाळून टाकील.

१८ आणखी त्यानें दुसऱ्याहि पुष्कळ बोधाच्या गोष्टी
सांगून लोकांस सुवार्ता जाहीर केली. १९ मांडलिक हेरोद
याला त्याच्या भावाची बायको हेरोदिया इजविषयीं आणि
त्यानें केलेल्या सर्व कुकर्मांविषयीं योहानानें दोष दिल्यामुळें,
२० त्यानें, या सर्वांहून अधिक हेंहि केलें कीं त्याला
बंदिशाळेंत कोंडिलें.

## येशूचा बाप्तिस्मा

२१ सर्व लोकांनीं बाप्तिस्मा घेतला व येशूहि बाप्तिस्मा
घेऊन प्रार्थना करीत असतां असें झालें कीं आकाश
उघडलें, २२ पवित्र आत्मा देहरूपानें कबुतराप्रमाणें
त्याजवर उतरला, आणि अशी आकाशवाणी झाली कीं तूं
माझा प्रिय पुत्र आहेस, तुजविषयीं मी संतुष्ट आहें.

## येशूची वंशावळी

२३ येशूनें आपल्या कार्याचा आरंभ केला तेव्हां तो
सुमारें तीस वर्षांचा होता, त्याला योसेफाचा पुत्र असें
लोक समजत. योसेफ एलीचा, २४ तो मत्ताथाचा, तो
लेवीचा, तो मल्खीचा, तो यन्नयाचा, तो योसेफाचा,
२५ तो मत्तिथ्याचा, तो आमोसाचा, तो नहूमाचा, तो
हेस्लीचा, तो नग्गयाचा, २६ तो महथाचा, तो मत्तिथ्याचा,
तो शिमयीचा, तो योसेखाचा, तो योदाचा, २७ तो
योहानानाचा, तो रेशाचा, तो जरूब्बाबेलाचा, तो शल्ती-
एलाचा, तो नेरीचा, २८ तो मल्खीचा, तो अद्दीचा,
तो कोसामाचा, तो एल्मदामाचा, तो एराचा, २९ तो
येशूचा, तो अलियेजराचा, तो योरीमाचा, तो मत्ताथाचा,
तो लेवीचा, ३० तो शिमोनाचा, तो यहूदाचा, तो
योसेफाचा, तो योनामाचा, तो एल्याकीमाचा, ३१ तो
मल्याचा, तो मिन्नाचा, तो मत्तत्ताचा, तो नाथानाचा, तो
दाविदाचा, ३२ तो इशायाचा, तो ओबेदाचा, तो बवा-
जाचा, तो सल्मोनाचा, तो नहशोनाचा, ३३ तो अम्मी-
नादाबाचा, तो अर्णयाचा, तो हेस्रोनाचा, तो पेरेसाचा, तो
यहूदाचा, ३४ तो याकोबाचा, तो इसहाकाचा, तो
अब्राहामाचा, तो तेरहाचा, तो नाहोराचा, ३५ तो
सरूगाचा, तो रऊचा, तो पेलेगाचा, तो एबराचा, तो
शेलहाचा, ३६ तो केनानाचा, तो अर्पक्षदाचा, तो शेमाचा,
तो नोहाचा, तो लामेखाचा, ३७ तो मथूशलहाचा, तो
हनोखाचा, तो यारेदाचा, तो महललेलाचा, तो केनानाचा,
३८ तो अनोशाचा, तो शेथाचा, तो आदामाचा, तो
देवाचा पुत्र.

## येशूची अरण्यांत परीक्षा

१ येशू पवित्र आत्म्यानें परिपूर्ण होत्साता यार्देने-
४ पासून माघारा आला, आणि त्याला आत्म्यानें
चाळीस दिवस अरण्यांत नेलें; २ तेथें सैतानानें
त्याची परीक्षा केली. त्या दिवसांत त्यानें कांहीं खाल्लें नाहीं;
ते समाप्त झाल्यावर त्याला भूक लागली. ३ तेव्हां सैतान
त्याला म्हणाला, तूं देवाचा पुत्र असलास तर या धोंड्यास
भाकर हो असें सांग. ४ येशूनें त्याला उत्तर दिलें, 'मनुष्य
केवळ भाकरीनें वांचेल असें नाहीं,' असें लिहिलें आहे.
५ मग त्यानें त्याला वर नेऊन जगांतील सर्व राज्यें एका
क्षणांत दाखविलीं; ६ आणि सैतानानें त्याला म्हटलें, त्या
सर्वांवरील अधिकार व त्यांचें वैभव मी तुला देईन, कारण
हें मला सोपून दिलें आहे व माझ्या मनास येईल त्याला
मी हें देतों. ७ तूं मला नमन करशील तर हें सर्व तुझें
होईल. ८ येशूनें त्याला उत्तर दिलें, 'प्रभु तुझा देव
याला नमन कर, व केवळ त्याचीच सेवा कर,' असें
लिहिलें आहे. ९ नंतर त्यानें त्याला यरुशलेमांत नेऊन
मंदिराच्या कंगोऱ्यावर उभें केलें व म्हटलें, तूं देवाचा
पुत्र असलास तर एथून खालीं उडी टाक, १० कारण
असें लिहिलें आहे कीं

तुझें रक्षण करण्यास तो आपल्या दूतांस तुजविषयीं
आज्ञा देईल;

११ आणि

तुझ्या पायांना धोंड्याची ठेच लागूं नये म्हणून
ते तुला आपल्या हातांवर झेलून धरतील.

१२ येशूनें त्याला उत्तर दिलें कीं 'प्रभु जो तुझा देव
त्याची परीक्षा पाहूं नको,' असें सांगितलें आहे.

१३ मग सैतान सर्व परीक्षा संपवून कांहीं वेळपर्यंत
त्याजपासून गेला.

## नासरेथांत येशू

१४ नंतर येशू आत्म्याच्या सामर्थ्यानें गालीलांत
माघारा आला, व त्याची कीर्ति चहूंकडल्या सर्व प्रांतांत
पसरली. १५ तो त्यांच्या सभास्थानांत शिक्षण देत असतां
सर्वांनीं त्याचा महिमा वर्णिला.

१६ मग ज्या नासरेथांत तो लहानाचा मोठा झाला
तेथें तो आला, आणि आपल्या परिपाठाप्रमाणें शब्बाथ
दिवशीं सभास्थानांत जाऊन वाचावयास उभा राहिला.
१७ तेव्हां यशया संदेष्ट्याचें पुस्तक त्याला दिलें, तें
पुस्तक त्यानें उघडून जें स्थळ काढिलें त्यांत असें लिहिलें
होतें कीं

१८ प्रभूचा आत्मा मजवर आला आहे,
कारण दीनांस सुवार्ता सांगण्यास त्यानें मला अभिषेक
केला;
धरून नेलेल्यांची सुटका

व अंधळ्यांस दृष्टि
हीं विदित करावयास,
ठेचलेल्यांस मोकळे करावयास,
१९ परमेश्वराच्या प्रसादाचें वर्ष विदित करावयास
त्यानें मला पाठविलें आहे.
२० मग पुस्तक गुंडाळून व तें सेवकास परत देऊन तो
खालीं बसला, आणि सभास्थानांतील सर्व लोकांची दृष्टि
त्याजकडे लागली. २१ मग तो त्यांस म्हणूं लागला कीं
हा शास्त्रलेख आज तुम्ही ऐकत असतां पूर्ण झाला आहे.
२२ तेव्हां सर्वांनीं त्याजविषयीं आपली मान्यता दाखविली
आणि जीं कृपावचनें त्याच्या मुखांतून निघालीं त्यांविषयीं
आश्चर्य केलें; ते म्हणाले, हा योसेफाचा पुत्र ना? २३
त्यानें त्यांस म्हटलें, खरोखर तुम्ही मला ही म्हण लावाल,
हे वैद्या, तूं आपणालाच बरें कर; कफर्णहूमांत ज्या गोष्टी
तूं केल्यास असें आम्हीं ऐकलें त्या एथेंहि आपल्या देशांत
कर. २४ तो म्हणाला, मी तुम्हांस खचीत सांगतों, कोण-
ताहि संदेष्टा आपल्या देशांत मान्य होत नाहीं. २५
आणखी मी तुम्हांस सत्य सांगतों एलीयाच्या काळांत
साडेतीन वर्षेंपर्यंत आकाश बंद राहून सर्व देशांत मोठा
दुष्काळ पडला होता, तेव्हां इस्राएलांत पुष्कळ विधवा
होत्या; २६ तरी 'सीदोनाच्या प्रदेशांतील सारफथ एथील
एका विधवेशिवाय' त्यांतील कोणा एकीकडेहि एलीयाला
पाठविलें नाहीं. २७ तसेंच अलीशा संदेष्ट्याच्या वेळेस
इस्राएलांत पुष्कळ कुष्ठरोगी होते, तरी सुरीय नामान
याच्याशिवाय त्यांतील कोणीहि शुद्ध झाला नाहीं. २८ हें
ऐकतांच सभास्थानांतील सर्व लोक संतापून गेले, २९
त्यांनीं उठून त्याला गांवाबाहेर घालविलें, आणि ज्या
डोंगरावर त्यांचें गांव वसलें होतें त्याच्या कड्यावरून त्याला
लोटून देण्यास तेथवर नेलें; ३० पण तो त्यांच्यामधून
निघून चालता झाला.

## भूतग्रस्ताला बरें करणें

३१ तो गालीलांतील कफर्णहूम गांवांत खालीं आला
व शब्बाथ दिवशीं त्यांस शिकवीत असतां ३२ त्याच्या
शिक्षणावरून ते थक्क झाले, कारण त्याचें बोलणें अधिकार-
युक्त होतें. ३३ तेव्हां अशुद्ध भूताच्या आत्म्यानें पछाड-
लेला कोणीएक मनुष्य सभास्थानांत होता; तो मोठ्यानें
ओरडून म्हणाला, ३४ अरे येशू नासरेथकरा! आमचा
तुझा काय संबंध? आमचा नाश करावयास आलास काय?
तूं कोण आहेस हें मला ठाऊक आहे; देवाचा पवित्र
[पुरुष] तो. ३५ तेव्हां येशू त्याला दटावून म्हणाला,
गप्प राहा, व याच्यांतून नीघ. मग भूत त्या मनुष्याला
मध्यें पाडून कांहीं उपद्रव न करितां त्याच्यांतून निघून गेलें.
३६ तेव्हां सर्व जण विस्मित होऊन आपसांत एकमेकांस
म्हणाले, काय हें बोलणें? हा अधिकारानें व सामर्थ्यानें
अशुद्ध आत्म्यांस आज्ञा करितो, आणि ते निघून जातात.
३७ नंतर त्याजविषयींची आख्या चहूंकडल्या प्रांतांत
सर्वत्र झाली.

## शिमोनाची सासू व इतर कांहीं रोगी यांस बरें करणें

३८ मग तो सभास्थानांतून उठून शिमोनाच्या घरांत
गेला. शिमोनाची सासू कडक ताप येऊन पडली होती,
तिच्यासाठीं त्यांनीं त्याच्याजवळ विनंति केली. ३९ तेव्हां
त्यानें तिच्यावर ओणवून तापाला दटाविलें, तेव्हां तो
निघाला, व ती तत्क्षणीं उठून त्यांची सेवा करूं लागली.
४० मग ज्या कोणाचीं माणसें नाना प्रकारच्या रोगांनीं
बेजार झालीं होतीं त्या सर्वांनीं त्यांना त्याजकडे सूर्या-
स्ताच्या वेळीं आणिलें, आणि त्यानें त्यांच्यांतील प्रत्येकावर
हात ठेवून त्यांस बरें केलें. ४१ भूतें देखील, तूं देवाचा
पुत्र आहेस, अशी आरोळी ठोकून पुष्कळ मनुष्यांतून
निघालीं; परंतु त्यानें त्यांस दटावून बोलूं दिलें नाहीं;
कारण तो ख्रिस्त आहे हें त्यांस ठाऊक होतें.
४२ मग दिवस उगवल्यावर तो निघून रानांत गेला;
तेव्हां लोकसमुदाय त्याचा शोध करीत त्याच्याजवळ आले,
आणि आपणांपासून त्यानें जाऊं नये म्हणून त्याला त्यांनीं
अडविलें असतें; ४३ परंतु तो त्यांस म्हणाला, मला दुसऱ्या
गांवांतहि देवाच्या राज्याची सुवार्ता सांगितली पाहिजे,
कारण यासाठींच मला पाठविलें आहे.
४४ मग तो गालीलाच्या सभास्थानांतून उपदेश करीत
फिरला.

## प्रथम शिष्यांस पाचारण

१ नंतर असें झालें कीं लोकसमुदाय त्याच्याजवळ
५ गर्दी करून देववचन ऐकत असतां तो गनेसरेत सरो-
वराच्या कांठीं उभा होता; २ तेव्हां त्यानें सरोवराच्या
कांठीं लागलेले दोन मचवे पाहिले; त्यांवरील कोळी खालीं
उतरून जाळीं धूत होते. ३ त्या मचव्यांपैकीं एक शिमो-
नाचा होता; त्यावर चढून तो कांठापासून थोडासा लोटावा
म्हणून त्यानें त्याला सांगितलें; मग त्यानें बसून मचव्यांतून
समुदायांस शिक्षण दिलें. ४ आपलें बोलणें संपविल्यावर
त्यानें शिमोनाला म्हटलें, खोल पाण्यांत जाऊं द्या व मासे
धरण्यासाठीं आपलीं जाळीं खालीं सोडा. ५ शिमोनानें
त्याला उत्तर दिलें, गुरुजी, आम्हीं सारी रात्र कष्ट करून
कांहीं धरिलें नाहीं; तरी आपल्या सांगण्यावरून मी जाळीं
सोडितों. ६ मग त्यांनीं तसें केल्यावर माशांचा मोठा
घोळका जाळ्यांत सांपडला आणि त्यांचीं जाळीं फाटूं
लागलीं. ७ तेव्हां जे भागीदार दुसऱ्या मचव्यांत होते
त्यांनीं येऊन आपणांला साहाय्य करावें म्हणून त्यांनीं त्यांस
खुणाविलें. मग ते आल्यावर दोन्ही मचवे इतके भरले
कीं ते बुडूं लागले. ८ हें पाहून शिमोन पेत्र येशूच्या पायां
पडून म्हणाला, प्रभुजी, मजपासून जा, मी पापी मनुष्य
आहें. ९ कारण त्यांनीं धरलेल्या माशांचा समुदाय पाहून तो
व त्याजबरोबर असलेले सर्व जण विस्मित झाले होते; १०
तसेंच शिमोनाचे भागीदार जब्दीचे पुत्र याकोब व
योहान हेहि विस्मित झाले होते. तेव्हां येशू शिमोनाला
म्हणाला, भिऊं नको; एथून पुढें तूं मनुष्यांना धरिशील.
११ मग मचवे कांठीं लाविल्यावर सर्व सोडून देऊन ते
त्याचे अनुयायी झाले.

## कुष्ठरोगी रोगमुक्त होतो

१२ पुढें असें झालें कीं तो एका गांवांत असतां, पाहा,
तेथें कुष्ठरोगानें व्याप्त असा एक मनुष्य होता; त्यानें
येशूला पाहून पालथें पडून त्याला विनंति केली कीं प्रभुजी,
आपली इच्छा असली तर मला शुद्ध करावयास आपण
समर्थ आहां. १३ तेव्हां त्यानें हात पुढें करून त्याला
स्पर्श करून म्हटलें, माझी इच्छा आहे; शुद्ध हो; आणि
लागलेंच त्याचें कुष्ठ गेलें. १४ मग त्यानें त्याला निक्षून
सांगितलें, कोणाला सांगूं नकोस; तर जाऊन स्वतःस
'याजकाला दाखीव,' आणि त्यांस प्रमाण पटावें म्हणून
मोशानें नेमून दिल्याप्रमाणें आपल्या शुद्धीकरणासाठीं अर्पण
कर. १५ तथापि त्याविषयींचें वर्तमान अधिकच पसरलें,
आणि पुष्कळ लोकसमुदाय ऐकावयास व आपले रोग बरे
करून घ्यावयास जमले. १६ तो तर अरण्यांत एकांतीं
जाऊन प्रार्थना करीत होता.

## पक्षघाती मनुष्य बरा होतो

१७ एके दिवशीं असें झालें कीं तो शिकवीत असतां
गालीलांतील प्रत्येक गांवाहून आणि यहूदीया व यरुशलेम
एथून आलेले परूशी व शास्त्राध्यापक बसले होते; आणि
लोकांना निरोगी करावयास प्रभूचें सामर्थ्य त्याच्या ठायीं
वसत होतें. १८ तेव्हां पाहा, कित्येक माणसांनीं कोणीएका
पक्षघाती मनुष्याला बाजेवर घालून आणिलें; व त्याला
आंत नेऊन त्याच्यासमोर ठेवावयाचा यत्न केला; १९
परंतु दाटीमुळें त्याला आंत नेण्याची सवड होईना, म्हणून
त्यांनीं घरावर चढून त्याला बाजेसुद्धां कौलारांतून येशूच्या
समोर खालीं सोडलें. २० तेव्हां त्यांचा विश्वास पाहून
तो म्हणाला; हे मनुष्या, तुझ्या पापांची क्षमा झाली आहे.
२१ तेव्हां शास्त्री व परूशी अशी वाटाघाट करूं लागले
कीं हा दुर्भाषण करणारा कोण आहे? केवळ देवावांचून
कोणाच्यानें पापांची क्षमा करवते? २२ येशूनें त्यांचे
विचार ओळखून त्यांस उत्तर दिलें, तुम्ही आपल्या मनांत
काय विचार करितां? २३ तुझ्या पापांची क्षमा झाली
आहे हें म्हणणें, किंवा उठून चाल हें म्हणणें, यांतून
कोणतें सोपें? २४ पृथ्वीवर पापांची क्षमा करावयास
मनुष्याच्या पुत्राला अधिकार आहे हें तुम्हांस समजावें
म्हणून—(तो पक्षघाती मनुष्याला म्हणाला) मी तुला
सांगतों, ऊठ, आपली बाज उचलून घेऊन आपल्या घरीं
जा. २५ तेव्हां तो लागलाच त्यांच्यासमक्ष उठून ज्याच्या-
वर निजला होता ती उचलून घेऊन देवाचा महिमा वर्णीत
आपल्या घरीं गेला. २६ तेव्हां सर्वांस विस्मय प्राप्त झाला;
ते देवाचा महिमा वर्णूं लागले आणि फार भयभीत होऊन
म्हणाले, आम्हीं आज विलक्षण गोष्टी पाहिल्या आहेत.

## लेवीला पाचारण

२७ त्यानंतर तो बाहेर गेला तेव्हां त्यानें लेवी
नांवाच्या एका जकातदाराला जकातीच्या नाक्यावर बस-
लेलें पाहिलें, व त्याला म्हटलें, माझ्यामागें ये. २८ तेव्हां
तो सर्व सोडून त्याच्यामागें उठून गेला.

२९ मग लेवीनें आपल्या घरीं त्याला मोठी मेजवानी
केली; त्या वेळीं त्यांजबरोबर जकातदार व दुसरे लोक
यांचा मोठा समुदाय जेवावयास बसला होता. ३० तेव्हां
तेथील परूशी व शास्त्री हे त्याच्या शिष्यांशीं कुरकूर
करून म्हणाले, तुम्ही जकातदार व पापी लोक यांजबरोबर
कां खातांपितां? ३१ येशूनें त्यांस उत्तर दिलें, निरोग्यांस
वैद्याची गरज नाहीं, तर दुखणाइतांस आहे. ३२ मी
धार्मिकांस नाहीं, तर पापिष्ठांस पश्चात्तापासाठीं बोलावण्यास
आलों आहें.

## उपासविषयक प्रश्न

३३ तेव्हां त्यांनीं त्याला म्हटलें, योहानाचे शिष्य
वारंवार उपास व प्रार्थना करितात; आणि तसें परूश्यांचेहि
शिष्य करितात; आपले शिष्य तर खातातपितात. ३४
येशूनें त्यांस म्हटलें, वऱ्हाड्यांबरोबर वर आहे तोंपर्यंत
त्यांजकडून उपास करवाल काय? ३५ तरी असे दिवस
येतील; मग त्यांजपासून वराला काढून नेतील त्या दिव-
सांत ते उपास करितील. ३६ आणखी त्यानें त्यांस
दाखलाहि सांगितला, कोणी नवें वस्त्र फाडून त्याचें जुन्या
वस्त्राला ठिगळ लावीत नाहीं; असें केलें तर त्यानें नवें
फाडिलें व नव्याचें ठिगळ जुन्याशीं जमलें नाहीं असें
होईल. ३७ आणि नवा द्राक्षारस जुन्या बुधल्यांत कोणी
घालीत नाहीं; घातला तर नवा द्राक्षारस बुधले फोडून
सांडून जाईल व बुधलेहि नासतील. ३८ यास्तव नवा
द्राक्षारस नव्या बुधल्यांत घालावा. ३९ जुना द्राक्षारस
प्याल्यावर नव्याची कोणी इच्छा करीत नाहीं, कारण जुना
चांगला आहे असें तो म्हणतो.

## शब्बाथाचें पालन

१ मग एका शब्बाथवारीं असें झालें कीं तो शेतां-
६ मधून जात होता; तेव्हां त्याचे शिष्य कणसें मोडून
हातांवर चोळून खाऊं लागले. २ तेव्हां परूश्यांतील
कोणी म्हणाले, शब्बाथवारीं जें करूं नये तें तुम्ही कां
करितां? ३ येशूनें त्यांस उत्तर दिलें, दावीद व त्याच्या-
बरोबरचीं माणसें यांस भूक लागली तेव्हां त्यानें काय केलें
हें तुमच्या वाचण्यांत कधीं आलें नाहीं काय? ४ तो
देवाच्या मंदिरांत गेला आणि ज्या 'समर्पित भाकरी'
याजकांशिवाय कोणी खाऊं नयेत त्या घेऊन त्यानें खाल्ल्या
व आपल्या बरोबरच्यांसहि दिल्या. ५ आणखी तो त्यांस
म्हणाला, मनुष्याचा पुत्र शब्बाथाचा धनी आहे.

६ नंतर दुसऱ्या एका शब्बाथवारीं असें झालें: त्यानें
सभास्थानांत जाऊन शिकविलें, तेथें उजवा हात वाळलेला
असा एक मनुष्य होता. ७ तेव्हां शास्त्री व परूशी त्याज-
वर दोष ठेवावयास सांपडावा म्हणून तो शब्बाथवारीं रोग
बरा करतो कीं काय हें पाहावयास टपून राहिले; ८ परंतु
त्यानें त्यांचे विचार ताडून त्या हात वाळलेल्या मनुष्याला
सांगितलें, ऊठ व मध्यें उभा राहा; मग तो उठून उभा
राहिला. ९ तेव्हां येशू त्यांस म्हणाला, मी तुम्हांस
विचारितों, शब्बाथवारीं बरें करणें योग्य किंवा वाईट
करणें योग्य; जीव वांचविणें योग्य किंवा त्याचा नाश
करणें योग्य? १० मग त्यानें सभोवतें त्या सर्वांकडे
पाहून त्याला सांगितलें, हात लांब कर. तेव्हां त्यानें
तसें केलें; आणि त्याचा हात बरा झाला. ११ मग ते
संतापानें वेडे होऊन येशूला काय करावें याविषयीं
एकमेकांत विचार करूं लागले.

## बारा प्रेषित

१२ त्या दिवसांत असें झालें कीं तो प्रार्थना करा-
वयास डोंगरावर गेला आणि रात्रभर देवाची प्रार्थना करीत
राहिला. १३ मग दिवस उगवल्यावर त्यानें आपल्या
शिष्यांस बोलाविलें; आणि त्यांतून बारा जणांस निवडून
त्यांस प्रेषित असें नांवहि दिलें; १४ ते हे: शिमोन, त्याला
त्यानें पेत्र हेंहि नांव दिलें; त्याचा भाऊ अंद्रिया, याकोब
व योहान; फिलिप्प व बर्थलमय; १५ मत्तय व थोमा;
अल्फीचा पुत्र याकोब, व जिलोत म्हटलेला शिमोन; १६
याकोबाचा पुत्र यहूदा आणि येशूला ज्यानें धरून दिलें तो
यहूदा इस्कर्योत. १७ येशू त्यांजबरोबर खालीं उतरून
सपाटीच्या जागेवर उभा राहिला. तेथें त्याच्या शिष्यांचा

मोठा समुदाय, आणि सर्व यहूदीया व यरुशलेम यांपासून,
व सोर व सीदोन यांकडल्या समुद्रकांठापासून त्याचें
श्रवण करावयास व आपले रोग बरे करून घ्यावयास जे
लोक आले होते त्यांचा मोठा मेळा तेथें उभा होता; १८
तेव्हां जे अशुद्ध आत्म्यांनीं पीडलेले होते त्यांस त्यानें
बरें केलें. १९ तेव्हां सर्व समुदायानें त्याला स्पर्श करा-
वयास धडपड केली, कारण त्यांतून सामर्थ्य निघून तें
सर्वांस निरोगी करीत होतें.

### धन्यवाद व दुःखोद्गार

२० तेव्हां त्यानें आपल्या शिष्यांकडे दृष्टि लावून
म्हटलें, अहो दीनांनो, तुम्ही धन्य; कारण देवाचें राज्य
तुमचें आहे. २१ अहो जे आतां भुकेले आहां ते तुम्ही
धन्य; कारण तुम्ही तृप्त व्हाल. अहो जे आतां रुदन करितां
ते तुम्ही धन्य; कारण तुम्ही हसाल. २२ मनुष्याच्या
पुत्रामुळें लोक तुमचा द्वेष करितील, तुम्हांस दूर
करितील, निंदितील आणि तुमचें नांव वाईट म्हणून
टाकून देतील, तेव्हां तुम्ही धन्य. २३ त्या दिवशीं
आनंदित होऊन उड्या मारा; कारण पाहा, स्वर्गांत
तुमचें प्रतिफळ मोठें आहे; त्यांचे पूर्वज संदेष्ट्यांस
असेंच करीत. २४ तुम्हां धनवानांस धिक्कार असो!
कारण तुम्हांस आपलें सांत्वन भरून मिळालें आहे.
२५ अहो जे आतां तृप्त झालां आहां, त्या
तुम्हांस धिक्कार असो! कारण तुम्हांला भूक लागेल,
अहो जे आतां हसतां त्या तुम्हांस धिक्कार असो!
कारण तुम्ही शोक कराल व रडाल. २६ जेव्हां
सर्व लोक तुम्हांस बरें म्हणतील तेव्हां तुम्हांस
धिक्कार असो! त्यांचे पूर्वज खोट्या संदेष्ट्यांस असेंच
करीत.

### शत्रूंवर प्रेम

२७ तुम्हां ऐकणाऱ्यांस मी सांगतों, तुम्ही
आपल्या वैऱ्यांवर प्रीति करा; जे तुमचा द्वेष करि-
तात त्यांचें बरें करा; २८ जे तुम्हांस शाप देतात
त्यांस आशीर्वाद द्या, जे तुमची निर्भर्त्सना करितात
त्यांजसाठीं प्रार्थना करा. २९ जो तुझ्या एका गालावर
मारितो त्याजपुढें दुसराहि कर; आणि जो तुझा
अंगरखा घेतो त्याला तुझी बंडीहि घ्यावयास अनमान
करूं नको. ३० जो कोणी तुझ्याजवळ मागतो
त्याला दे; जो तुझें कांहीं हरण करितो त्याजपाशीं
तें परत मागूं नको. ३१ लोकांनीं तुम्हांशीं जसें
वर्तावें म्हणून तुमची इच्छा आहे, तसेंच तुम्हीहि
त्यांजशीं वर्तन करा. ३२ जे तुम्हांवर प्रीति करितात
त्यांजवर तुम्हीं प्रीति केली तर त्यांत तुमचा उपकार
तो काय? कारण पापी लोकहि आपणांवर प्रीति
करणाऱ्यांवर प्रीति करितात. ३३ जे तुमचें बरें करितात
त्यांचें तुम्ही बरें केलें तर त्यांत तुमचा उपकार तो काय?
पापी लोकहि तसेंच करितात. ३४ ज्यांच्यापासून परत
मिळण्याची आशा आहे त्यांस तुम्हीं उसनें दिलें तर
त्यांत तुमचा उपकार तो काय? जितकें दिलें तितकें
परत मिळण्याच्या आशेनें पापी लोकहि पापी लोकांस
उसनें देतात. ३५ तुम्ही तर आपल्या वैऱ्यांवर प्रीति
करा, त्यांचें बरें करा; निराश न होतां उसनें द्या;
म्हणजे तुमचें प्रतिफळ मोठें होईल आणि तुम्ही
परात्पराचे पुत्र व्हाल; तो अनुपकारी व वाईट यांज-
वरहि उपकार करणारा आहे. ३६ जसा तुमचा पिता
दयाळू आहे तसे तुम्हीहि दयाळू व्हा.

### इतरांचे गुणदोष काढण्याबाबत

३७ तुम्ही कोणाचा न्यायनिवाडा करूं नका म्हणजे
तुमचा न्यायनिवाडा कोणी करणार नाहीं; कोणाला दोषी
ठरवूं नका म्हणजे तुम्हांला कोणी दोषी ठरविणार
नाहीं; सोडा म्हणजे तुम्हांस सोडतील; ३८ द्या म्हणजे
तुम्हांस दिलें जाईल; चांगलें माप दडपून, हालवून व शींग
भरून तुमच्या पदरीं घालतील; कारण ज्या मापानें तुम्ही
मोजून घालतां त्याच मापानें तुम्हांस परत घालतील.
३९ त्यानें त्यांस दाखलाहि दिला कीं आंधळ्याच्यानें
आंधळ्याला वाट दाखवून नेववतें काय? दोघेहि खाचेंत
पडतील कीं नाहींत? ४० शिष्य आपल्या गुरूहून श्रेष्ठ
होत नाहीं; फार झालें तर पूर्ण शिकलेला प्रत्येक शिष्य
आपल्या गुरूसारखा होतो. ४१ तूं आपल्या डोळ्यांतलें
मुसळ ध्यानांत न आणितां आपल्या भावाच्या डोळ्यांतलें
कुसळ कां पाहतोस? ४२ अथवा तूं आपल्या डोळ्यांतलें

मुसळ न पाहतां आपल्या भावाला कसें म्हणशील कीं दादा, तुझ्या डोळ्यांतलें कुसळ मला काढूं दे? अरे ढोंग्या, पहिल्यानें आपल्या डोळ्यांतलें मुसळ काढ, म्हणजे तुझ्या भावाच्या डोळ्यांतलें कुसळ काढावयास तुला स्पष्ट दिसेल. ४३ ज्याला वाईट फळ येईल असें कोणतेंहि चांगलें झाड नाहीं; आणखी चांगलें फळ येईल असें कोणतेंहि वाईट झाड नाहीं. ४४ प्रत्येक झाड त्याच्या फळावरून ओळखूं येतें. कांट्यांच्या झाडापासून कोणी अंजीर काढीत नाहींत, आणि गौरीच्या झाडापासून द्राक्षें काढीत नाहींत. ४५ चांगला मनुष्य आपल्या अंतःकरणांतील चांगल्या भांडारांतून चांगलें काढितो; वाईट मनुष्य वाईटांतून वाईट काढितो; कारण अंतःकरणांत जें भरून गेलें आहे तेंच मुखावाटे निघणार.

## ऐकणें आणि करणें

४६ तुम्ही मला प्रभू प्रभू म्हणतां, पण जें मी सांगतों तें कां करीत नाहीं? ४७ जो कोणी मजकडे येतो व माझीं वचनें ऐकून त्यांप्रमाणें करितो तो कोणासारिखा आहे, हें मी तुम्हांस दाखवितों; ४८ तो कोणाएका घर बांधणाऱ्या मनुष्यासारिखा आहे; त्यानें खणीत खणीत खोल जाऊन खडकावर पाया घातला; मग पूर आला तेव्हां ओघ त्या घरावर आदळला, तरी त्यामुळें तें हाललें नाहीं; कारण तें मजबूत बांधलें होतें; ४९ परंतु जो कोणी ऐकून त्यांप्रमाणें करीत नाहीं तो पाया न घालतां जमिनीवर घर बांधणाऱ्या मनुष्यासारिखा आहे; त्या घरावर ओघ आदळला तेव्हां तें तत्क्षणीं पडलें; आणि त्याचा मोठा नाश झाला.

## शतपतीच्या चाकरास बरें करणें

७ १ नंतर लोक ऐकत असतां तो आपलीं सर्व वचनें समाप्त करून कफर्णहूमांत गेला.

२ तेव्हां कोणाएका जमादाराचा एक आवडता दास दुखणाईत होऊन मरणास टेकला होता. ३ त्यानें येशूविषयीं ऐकून यहूद्यांच्या वडीलमंडळास त्याजकडे पाठविलें व विनंति केली कीं आपण येऊन माझ्या दासाला वांचवावें. ४ ते येशूकडे येऊन आग्रहानें विनंति करून म्हणाले, त्याच्यासाठीं आपण हें करावें असा तो योग्य आहे; ५ कारण तो आपल्या राष्ट्रावर प्रेम करितो, आणि त्यानें आमच्याकरितां सभास्थान बांधून दिलें आहे. ६ तेव्हां येशू त्यांजबरोबर गेला; मग तो घराजवळ येतांच जमादारानें त्याजकडे मित्रांस पाठवून त्याला म्हटलें, प्रभुजी, श्रम घेऊं नका; कारण आपण माझ्या छपराखालीं यावें अशी माझी योग्यता नाहीं; ७ यामुळें आपणाकडे येण्यासहि मीं स्वतःला योग्य मानिलें नाहीं; तर शब्द बोला म्हणजे माझा चाकर बरा होईल. ८ कारण मीहि ताबेदार मनुष्य असून माझ्या स्वाधीन शिपाई आहेत; मीं एकाला जा म्हटलें म्हणजे तो जातो; दुसऱ्याला ये म्हटलें म्हणजे तो येतो, आणि आपल्या दासाला अमुक कर म्हटलें म्हणजे तो तें करितो. ९ या गोष्टी ऐकून येशूला त्याचें आश्चर्य वाटलें; आणि तो वळून आपल्यामागें चालणाऱ्या लोकसमुदायाला म्हणाला, मी तुम्हांस सांगतों, एवढा विश्वास इस्राएलांतहि मला आढळला नाहीं. १० नंतर ज्यांना पाठविलें होतें ते माघारे घरीं आल्यावर त्यांस तो दास बरा झालेला आढळला.

## विधवेच्या मुलास बरें करणें

११ नंतर लवकरच असें झालें कीं तो नाईन नांवाच्या गांवास गेला; आणि त्याचे शिष्य व मोठा लोकसमुदाय त्याच्याबरोबर गेला. १२ तो गांवाच्या वेशीजवळ येऊन पोहंचला तेव्हां पाहा, कोणीएका मेलेल्या इसमाला बाहेर नेत होते; तो आपल्या आईचा एकुलता एक पुत्र असून ती विधवा होती; आणि त्या गांवचे पुष्कळ लोक तिच्याबरोबर होते. १३ तिला पाहून प्रभूला तिचा कळवळा आला, व तो तिला म्हणाला, रडूं नको. १४ मग जवळ जाऊन त्यानें तिरडीस स्पर्श केला; तेव्हां खांदेकरी उभे राहिले; आणि तो म्हणाला, मुला, मी तुला सांगतों, ऊठ. १५ तेव्हां मेलेला उठून बसला व बोलूं लागला. मग त्यानें त्याला त्याच्या आईच्या हवालीं केलें. १६ तेव्हां सर्वांस भय प्राप्त झालें, आणि ते देवाला गौरवीत म्हणाले, आम्हांमध्यें मोठा संदेष्टा उत्पन्न झाला आहे; आणि देवानें आपल्या लोकांची भेट घेतली आहे; १७ त्याजविषयींची ही बातमी सगळ्या यहूदीयांत व चहूंकडल्या सर्व प्रांतांत पसरली.

## बाप्तिस्मा करणारा योहान

१८ या सर्व गोष्टींविषयीं योहानाला त्याच्या शिष्यांनीं
सांगितलें. १९ मग योहानानें आपल्या शिष्यांतील दोघांस
जवळ बोलावून प्रभूकडे असें विचारावयास पाठविलें कीं
जे यावयाचे ते आपण आहां, किंवा आम्हीं दुसऱ्याची
वाट पाहावी ? २० तीं मनुष्यें त्याजकडे येऊन म्हणालीं,
बाप्तिस्मा करणारा योहान यानें आम्हांस आपणाकडे असें
विचारावयास पाठविलें आहे कीं जे यावयाचे ते आपण
आहां, किंवा आम्हीं दुसऱ्याची वाट पाहावी ? २१ त्याच
घटकेस त्यानें पुष्कळ लोकांस रोग, पीडा व वाईट आत्मे
यांपासून मुक्त केलें; आणि बहुत अंधळ्यांस दृष्टि दिली.
२२ मग त्यानें त्यांस उत्तर दिलें, तुम्हीं ज्या गोष्टी
पाहिल्या व ऐकल्या त्या योहानाला जाऊन सांगा : 'अंधळे
डोळस होतात,' पांगळे चालतात, कुष्ठरोगी शुद्ध होतात,
बहिरे ऐकतात, मेलेले उठतात, व 'गरिबांस सुवार्ता
सांगण्यांत येते.' २३ जो कोणी मजविषयीं अडखळत
नाहीं तो धन्य आहे.

२४ मग योहानाचे निरोप्ये गेल्यावर तो योहानाविषयीं
समुदायांस म्हणूं लागला, तुम्ही काय पाहावयास रानांत
गेलां होतां ? वाऱ्यानें हालविलेला बोरू काय ? २५ तर
काय पाहावयास गेलां होतां ? मऊ वस्त्रें ल्यालेल्या मनु-
ष्याला काय ? पाहा, भडक पोषाख करणारे व चैन
करणारे राजवाड्यांत असतात. २६ तर तुम्ही काय
पाहावयास गेलां होतां ? संदेष्ट्याला काय ? हो, मी तुम्हांस
सांगतों, संदेष्ट्याहूनहि जो श्रेष्ठ अशाला. २७ ज्याविषयीं
लिहिलें आहे :

पाहा, मी आपला निरोप्या तुझ्यापुढें पाठवितों,
तो तुझा मार्ग तुझ्यासमोर सिद्ध करील,

तो हाच आहे. २८ मी तुम्हांस सांगतों, स्त्रियांपासून
जन्मलेल्या इसमांमध्यें योहानापेक्षां मोठा कोणी नाहीं;
तरी देवाच्या राज्यांत कनिष्ठ असलेला तो त्याजहूनहि
श्रेष्ठ आहे. २९ योहानाचें श्रवण करून सर्व लोकांनीं व
जकातदारांनीं त्याचा बाप्तिस्मा घेतला, तेणेंकरून त्यांनीं
देवाचें न्याय्यत्व मान्य केलें; ३० परंतु परूशी व शास्त्री
यांनीं त्याजपासून बाप्तिस्मा घेतला नाहीं; तेणेंकरून त्यांनीं
आपणांसंबंधानें असलेला देवाचा संकल्प व्यर्थ केला
३१ या पिढीच्या लोकांस मी कशाची उपमा देऊं ? ते
कशासारिखे आहेत ? ३२ जीं मुलें बाजारांत बसून
एकमेकांस हाका मारितात त्यांच्यासारिखे ते आहेत; तीं
म्हणतात, आम्हीं तुम्हांसाठीं पावा वाजविला तरी तुम्ही
नाचलां नाहीं; आम्हीं विलाप केला तरी तुम्ही रडलां
नाहीं. ३३ बाप्तिस्मा करणारा योहान भाकरी खात व
द्राक्षारस पीत आला नाहीं; आणि तुम्ही म्हणतां, त्याला
भूत लागलें आहे. ३४ मनुष्याचा पुत्र खातपीत आला
आहे, आणि तुम्ही म्हणतां, पाहा, हा खादाड व दारूबाज
मनुष्य, जकातदारांचा व पापी लोकांचा मित्र ! ३५ ज्ञान
आपल्या सर्व संततीच्या द्वारा न्याय्य ठरतें.

## येशूच्या चरणांस तैलाभ्यंग व दोन कर्जदारांचा दृष्टांत

३६ परूश्यांतील कोणीएकानें त्याला आपल्या येथें
भोजन करण्याची विनंति केली; आणि तो त्या परूश्याच्या
घरीं जाऊन भोजनास बसला. ३७ तेव्हां पाहा, त्या
गांवांत कोणीएक पापी बायको होती; ती, तो परूश्याच्या
घरांत भोजनास बसला आहे हें ऐकून सुगंधी तेलाची
अलाबास्त्र कुपी घेऊन आली; ३८ आणि त्याच्या पायां-
जवळ मागें रडत उभें राहून आसवांनीं त्याचे पाय
भिजवूं लागली; तिनें आपल्या मस्तकाच्या केसांनीं ते
पुसले, त्याच्या पायांचे मुके घेतले आणि त्यांस सुगंधी
तेल लाविलें. ३९ तेव्हां ज्या परूश्यानें त्याला बोलाविलें
होतें त्यानें हें पाहून आपल्या मनांत म्हटलें, हा संदेष्टा
असता तर याला शिवत असलेली स्त्री कोण व कशी आहे,
म्हणजे ती पापी आहे, हें याला कळलें असतें. ४० तेव्हां
येशूनें त्याला म्हटलें, शिमोना, मला तुजबरोबर कांहीं
बोलावयाचें आहे; तो म्हणाला, गुरुजी, बोलावें. ४१ एका
सावकाराचे दोन कर्जदार होते; एकाला शंभर रुपये देणें
होतें, व एकाला दहा होतें. ४२ देणें फेडावयास त्यांच्या-
जवळ कांहीं नव्हतें म्हणून त्यानें तें त्या दोघांस सोडिलें.
तर त्यांतून कोणता त्याजवर अधिक प्रीति करील ? ४३
शिमोनानें उत्तर दिलें, ज्याला अधिक सोडिलें तो, असें
मला वाटतें. मग तो त्याला म्हणाला, योग्य ठरविलेंस. ४४

तेव्हां त्यानें त्या स्त्रीकडे वळून शिमोनाला म्हटलें, तूं या
बाईला पाहतोस ना? मी तुझ्या घरीं आलों असतां तूं
माझ्या पायांसाठीं पाणी दिलें नाहीं; परंतु इनें आसवांनीं
माझे पाय भिजवून आपल्या केसांनीं ते पुसले; ४५ तूं
माझा मुका घेतला नाहीं; परंतु मी आंत आल्यापासून ही
माझ्या पायांचे मुके घेतां राहिली नाहीं; ४६ तूं माझ्या
मस्तकाला तेल लाविलें नाहीं; परंतु इनें माझ्या पायांस
सुगंधी तेल लाविलें. ४७ या कारणास्तव मी तुला सांगतों,
इचीं बहुत पापें आहेत तीं सोडण्यांत आलीं आहेत,
कारण इनें फार प्रीति केली; ज्याला थोडकें सोडिलें तो
थोडकी प्रीति करितो. ४८ मग त्यानें तिला म्हटलें,
तुझ्या पापांची क्षमा झाली आहे. ४९ तेव्हां त्याच्याबरोबर
भोजनास बसलेले आपसांत म्हणूं लागले, पापांची क्षमा
देखील करणारा हा कोण? ५० त्यानें त्या स्त्रीला म्हटलें,
तुझ्या विश्वासानें तुला तारिलें आहे; सुखरूप जा.

### येशूची सेवा करणाऱ्या स्त्रिया

१ नंतर लवकरच असें झालें कीं तो उपदेश
८ करीत व देवाच्या राज्याची सुवार्ता सांगत नगरो-
नगरीं व गांवोगांवीं फिरला; तेव्हां त्याजबरोबर बारा
जण होते. २ तेव्हां दुष्ट आत्मे व विकार यांपासून मुक्त
केलेल्या अशा कित्येक स्त्रिया, म्हणजे ज्या मग्दालीया
म्हटलेल्या मरीयेंतून सात भूतें निघालीं होतीं ती, ३
हेरोदाचा कारभारी खुजा याची बायको योहान्ना, सूसान्ना,
व पुष्कळ दुसऱ्या स्त्रिया त्याजबरोबर होत्या; त्या आपल्या
पैशाअडक्यानें त्यांची सेवाचाकरी करीत असत.

### पेरणी करणाऱ्याचा दृष्टांत

४ तेव्हां मोठा लोकसमुदाय एकत्र जमत असतां व गांवो-
गांवचेहि लोक त्याच्याजवळ येत असतां तो दाखला देऊन
बोलला: ५ एक पेरणारा आपलें बीं पेरावयास निघाला;
आणि तो पेरीत असतां कांहीं वाटेवर पडलें; तें तुडवून
गेलें व आकाशांतील पाखरांनीं खाऊन टाकिलें. ६ कांहीं
खडकाळीवर पडलें; तें ओलावा नसल्यामुळें उगवतांच
वाळून गेलें. ७ कांहीं कांटेरी झाडांमध्यें पडलें; कांटेरी
झाडें त्याबरोबर वाढल्यामुळें त्याची वाढ खुंटून गेली. ८
कांहीं चांगल्या मातींत पडलें; तें उगवून शंभरपट पीक
आलें. असें म्हटल्यावर तो मोठ्यानें बोलला, ज्याला ऐका-
वयास कान आहेत तो ऐको.

९ तेव्हां हा दाखला काय असावा, असें त्याच्या
शिष्यांनीं त्याला विचारिलें. १० तो म्हणाला, देवाच्या
राज्याचीं रहस्यें जाणण्याचें दान तुम्हांस दिलें आहे; परंतु
इतरांस तीं दाखल्यांनीं सांगितलीं आहेत, अशासाठीं कीं,
'त्यांनीं पाहत असतां पाहूं नये व ऐकत असतां समजूं
नये.' ११ हा दाखला असा आहे: बीं हें देवाचें वचन
आहे. १२ वाटेवर असलेले हे आहेत कीं ते ऐकतात;
नंतर त्यांनीं विश्वास धरून त्यांस तारणप्राप्ति होऊं नये
म्हणून सैतान येऊन त्यांच्या अंतःकरणांतून वचन काढून
नेतो. १३ खडकाळीवर असलेले हे आहेत कीं ते ऐकतात
तेव्हां वचन आनंदानें ग्रहण करितात; पण त्यांस मूळ
नसतें; ते कांहीं वेळपर्यंत विश्वास धरितात, व परीक्षेच्या
वेळीं भ्रष्ट होतात. १४ कांटेरी झाडांमध्यें पडलेले हे
आहेत कीं ते ऐकतात, आणि संसाराच्या चिंता, धन व
विषयसुखें यांत आयुष्यक्रमण करीत असतां त्यांची वाढ
खुंटते व ते पक्व फळ देत नाहींत. १५ चांगल्या मातींत
पडलेले हे आहेत कीं ते वचन ऐकून निष्कपट व चांगल्या
अंतःकरणांत धरून ठेवितात, आणि धीरानें फळ देत जातात.

### दिव्यावरून धडा

१६ कोणी दिवा लावून तो भांड्याखालीं झाकीत नाहीं
किंवा पलंगाखालीं ठेवीत नाहीं; तर आंत येणाऱ्यांनीं उजेड
पाहावा म्हणून तो दिवठणीवर ठेवितो. १७ प्रगट होणार
नाहीं असें कांहीं गुप्त नाहीं आणि कळणार नाहीं व उघडकीस
येणार नाहीं असें कांहीं झाकलेलें नाहीं. १८ यास्तव
तुम्ही कसें ऐकतां याविषयीं जपा; ज्याच्याजवळ आहे
त्याला दिलें जाईल, आणि ज्याच्याजवळ नाहीं त्याचें,
जें आहे म्हणून त्याला वाटतें, तें देखील त्याजपासून काढून
घेतलें जाईल.

### खरें बंधुत्व

१९ त्याची आई व भाऊ त्याजकडे आले, परंतु दाटी-
मुळें त्यांस त्याच्याजवळ येववेना. २० तेव्हां कोणी त्याला
सांगितलें कीं आपली आई व आपले भाऊ आपणाला
भेटण्याच्या इच्छेनें बाहेर उभे आहेत. २१ त्यानें त्यांस

उत्तर दिलें, देवाचें वचन ऐकणारे व पाळणारे हेच माझी आई व माझे भाऊ आहेत.

### येशू वादळ शांत करतो

२२ नंतर त्या दिवसांत एके वेळीं असें झालें कीं तो आपल्या शिष्यांसुद्धां मचव्यांत बसला; आणि आपण सरोवराच्या पलीकडे जाऊं असें त्यांस म्हणाला; तेव्हां त्यांनीं तो सोडिला. २३ नंतर ते हाकारून जात असतां तो झोपीं गेला; मग सरोवरांत मोठें वादळ सुटून मचव्यांत पाणी भरूं लागलें व ते संकटांत पडले. २४ तेव्हां ते त्याच्याजवळ येऊन त्याला जागें करून म्हणाले, गुरुजी, गुरुजी, आपण बुडतों; तेव्हां त्यानें उठून वाऱ्यास व पाण्याच्या कल्होळास धमकाविलें; मग तीं बंद होऊन निवांत झालें. २५ तेव्हां त्यानें त्यांस म्हटलें, तुमचा विश्वास कोठें आहे? ते भयभीत होऊन विस्मित झाले व एकमेकांस म्हणाले, हा आहे तरी कोण? कारण वारे व पाणी यांस देखील हा आज्ञा करितो व तीं त्याचें ऐकतात.

### गरसेकरांच्या देशांतील भूतग्रस्ताला बरें करणें

२६ मग ते गालीलाच्या समोरील गरसेकरांच्या देशास येऊन पोहंचले. २७ तो जमिनीवर उतरल्यावर नगरांतील एक इसम त्याला भेटला, त्याला भूतें लागलीं होतीं; बहुत काळपर्यंत तो वस्त्र म्हणून नेसला नव्हता, आणि घरांत न राहतां तो कबरांत राहत असे. २८ तो येशूला पाहून ओरडला व त्याच्या पुढें पडून मोठ्यानें म्हणाला, हे येशू, परात्पर देवाच्या पुत्रा, माझा तुझा काय संबंध? मी तुला विनंति करितों, मला पीडा देऊं नको. २९ कारण त्यानें त्या अशुद्ध आत्म्याला त्या मनुष्यांतून निघण्याची आज्ञा केली होती. त्यानें त्याला पुष्कळ वेळां धरिलें होतें; आणि सांखळ्यांनीं व बेड्यांनीं बांधून पहाऱ्यांत ठेविलेलें असतां तो तीं बंधनें तोडीत असे; आणि भूत त्याला रानांत हाकून नेत असे. ३० येशूनें त्याला विचारिलें, तुझें नांव काय? त्यानें म्हटलें, सैन्य; कारण त्याजमध्यें पुष्कळ भूतें शिरलेलीं होतीं. ३१ त्यांनीं त्याला विनंति केली कीं आम्हांस डोहांत जावयाला सांगूं नको. ३२ तेथें डुकरांचा मोठा कळप डोंगरांत चरत होता; त्यांत आम्हांस जाऊं दे, अशी त्यांनीं त्याला विनंति केली. मग त्यानें त्यांस परवानगी दिली. ३३ तेव्हां भूतें त्या मनुष्यांतून निघून त्या डुकरांत शिरलीं, आणि तो कळप धडक धावत जाऊन कड्यावरून सरोवरांत पडला आणि गुदमरून मेला. ३४ मग तीं चारणारे इसम हें झालेलें पाहून पळाले आणि नगरांत व शेतांमळ्यांत जाऊन त्यांनीं हें वर्तमान सांगितलें. ३५ तेव्हां जें झालें तें पाहावयास लोक निघाले, आणि येशूकडे आल्यावर ज्या मनुष्यांतून भूतें निघालीं होतीं तो येशूच्या पायांजवळ बसलेला, वस्त्र नेसलेला, व शुद्धीवर आलेला असा त्यांच्या दृष्टीस पडला; तेव्हां त्यांना भीति वाटली. ३६ ज्यांनीं तें पाहिलें होतें त्यांनीं तो भूतग्रस्त कसा बरा झाला, हें त्यांस सांगितलें. ३७ तेव्हां गरसेकरांच्या चहूंकडल्या प्रांतांतील सर्व लोकांनीं, आपण आम्हांपासून जावें, अशी त्याला विनंति केली; कारण ते फार भयभीत झाले होते; मग तो मचव्यांत बसून माघारें जाण्यास निघाला. ३८ तेव्हां ज्या मनुष्यांतून भूतें निघालीं होतीं त्यानें, मीं आपल्याजवळ असावें, अशी त्याकडे मागणी केली; परंतु त्यानें त्याला निरोप देऊन सांगितलें, ३९ आपल्या घरीं माघारें जा, आणि देवानें तुजसाठीं केवढीं कृत्यें केलीं आहेत तें कळीव. मग तो आपल्यासाठीं येशूनें केवढीं कृत्यें केलीं तें गांवभर सांगत फिरला.

### याईराच्या मुलीला जीवंत करणें व रक्तस्रावी स्त्रीला बरें करणें

४० नंतर येशू माघारें आला तेव्हां लोकसमुदायानें त्याचें स्वागत केलें; ते सर्व त्याची वाट पाहत होते. ४१ तेव्हां पाहा, याईर नामें कोणी मनुष्य आला, तो सभास्थानाचा अधिकारी होता; त्यानें येशूच्या पायां पडून, आपण माझ्या घरीं यावें, अशी त्याला विनंति केली; ४२ कारण त्याची सुमारें बारा वर्षांची एकुलती एक कन्या होती, ती मरणोन्मुख झाली होती. मग तो जात असतां लोकसमुदायांनीं त्याजभोंवतीं गर्दी केली.

४३ तेव्हां बारा वर्षें रक्तस्राव होत असलेली व कोणाच्या हातून बरी न झालेली अशी कोणीएक स्त्री ४४ त्याच्या पाठीमागें येऊन त्याच्या वस्त्राच्या गोंड्याला शिवली, आणि तत्क्षणीं तिचा रक्तस्राव थांबला. ४५ पण येशू म्हणाला,

मला कोण शिवलें? तेव्हां सर्व जण मी नाहीं, असें म्हणत
असतां पेत्र म्हणाला, गुरुजी, लोकसमुदाय आपणाला दाटी
करून चेंगरीत आहेत; ४६ पण येशू म्हणाला, कोणी तरी
मला शिवलेंच; माझ्यांतून शक्ति निघाली, हें मला समजलें.
४७ मग आपण गुप्त राहिलों नाहीं असें पाहून ती स्त्री
कांपत कांपत पुढें आली व त्याच्या पायां पडून; आपण
कोणत्या कारणाकरितां त्याला शिवलों व कसें तत्काळ बरें
झालों, हें तिनें सर्व लोकांच्या समक्ष निवेदन केलें. ४८
तेव्हां तो तिला म्हणाला, मुली, तुझ्या विश्वासानें तुला बरें
केलें आहे; सुखरूप जा.

४९ तो बोलत आहे इतक्यांत सभास्थानाच्या अधि-
काऱ्याच्या एथून कोणीं येऊन त्याला सांगितलें, आपली
मुलगी मरण पावली आहे; गुरुजीला श्रम देऊं नका. ५०
तें ऐकून येशू म्हणाला, भिऊं नको, विश्वास मात्र धर
म्हणजे ती बरी होईल. ५१ नंतर त्या घरीं आल्यावर त्यानें
पेत्र, योहान, याकोब व मुलीचे आईबाप यांच्याशिवाय
आपणाबरोबर कोणाला आंत येऊं दिलें नाहीं. ५२ तिच्या-
साठीं सर्व जण रडत व शोक करीत होते; पण तो म्हणाला,
रडूं नका, कारण ती मेली नाहीं, झोपेंत आहे. ५३ तरी
ती मेली आहे हें ठाऊक असल्यामुळें त्यांनीं त्याचा उप-
हास केला. ५४ मग त्यानें तिचा हात धरून, मुली, ऊठ,
असें मोठ्यानें म्हटलें. ५५ तेव्हां तिचा आत्मा परत आला
व ती तात्काळ उठली; मग तिला खावयास द्यावें म्हणून
त्यानें आज्ञा केली. ५६ तेव्हां तिचीं आईबापें थक्क झालीं;
पण ही घडलेली गोष्ट कोणाला सांगूं नका, असें त्यानें त्यांस
निक्षून सांगितलें.

### बारा प्रेषितांना कामगिरीवर पाठविणें

९ १ मग त्यानें बारा जणांस एकत्र बोलावून त्यांस
सर्व भूतें काढणें व रोग बरें करणें ह्या बाबतींत
सामर्थ्य व अधिकार दिला; २ आणि त्यानें त्यांस
देवाच्या राज्याची घोषणा करावयास व रोग्यांस बरें करा-
वयास पाठविलें. ३ त्यानें त्यांस सांगितलें, वाटेसाठीं कांहीं
घेऊं नका; काठी, झोळी, भाकरी किंवा पैका घेऊं नका;
अंगरखेहि दोन घेऊं नका. ४ ज्या कोणत्या घरांत तुम्ही
जाल, तेथेंच राहा व तेथूनच निघून जा. ५ जे कोणी
तुमचा स्वीकार करीत नाहींत त्यांजविरुद्ध साक्ष व्हावी
म्हणून तुम्ही त्या नगरांतून निघतेवेळेस आपल्या पायांची
धूळ झाडून टाका. ६ मग ते निघून सर्वत्र सुवार्ता सांगत
व रोग बरे करीत गांवोगांवीं फिरूं लागले.

### हेरोद घोंटाळ्यांत पडतो

७ तेव्हां घडत असलेल्या सर्व गोष्टींविषयीं मांडलिक
हेरोदानें ऐकलें; आणि तो मोठ्या घोटाळ्यांत पडला, कारण
योहान मेलेल्यांतून उठला आहे असें कित्येकांनीं म्हटलें; ८
कित्येकांनीं एलीया प्रगट झाला आहे असें व कित्येकांनीं
प्राचीन संदेष्ट्यांतील कोणी तरी उठला आहे असें म्हटलें.
९ हेरोद म्हणाला, मीं योहानाचा शिरच्छेद करविला, पण
ज्याच्याविषयीं मी अशा गोष्टी ऐकतों तो कोण आहे?
त्यावरून त्याला भेटण्याची त्यास उत्कंठा लागली.

### पांच हजारांना जेवूं घालणें

१० नंतर प्रेषितांनीं परत येऊन आपण जें जें केलें
होतें तें तें त्याला विदित केलें; तेव्हां तो त्यांस बरोबर
घेऊन बेथसैदा नामें नगराकडे एकांत स्थळीं गेला.
११ हें ताडून लोकसमुदाय त्याच्यामागून गेले; तेव्हां
त्यांचें स्वागत करून त्यांजबरोबर तो देवाच्या राज्या-
विषयीं बोलला, आणि ज्यांस बरें होण्याचें अगत्य होतें
त्यांस त्यानें बरें केलें. १२ दिवस उतरूं लागला तेव्हां
बारा जण जवळ येऊन त्याला म्हणाले, लोकसमुदायाला
निरोप द्या, म्हणजे ते भोंवतालच्या गांवांत व शेतांमळ्यांत
जाऊन उतरतील व खावयाला मिळवितील; आपण एथें
रानांतल्या ठिकाणीं आहों. १३ तो त्यांस म्हणाला, तुम्हीच
त्यांस खावयाला द्या. ते म्हणाले, आम्हीं जाऊन या सर्व
लोकांसाठीं अन्न विकत न घेतलें तर पांच भाकरी व दोन
मासे यांशिवाय आम्हांजवळ कांहीं नाहीं. १४ ते सुमारें
पांच हजार पुरुष होते. तेव्हां त्यानें आपल्या शिष्यांस
सांगितलें कीं सुमारें पन्नासपन्नासांच्या पंक्ति करून त्यांस
बसवा. १५ त्यांनीं त्याप्रमाणें करून सर्वांस बसविलें.
१६ तेव्हां त्यानें त्या पांच भाकरी व ते दोन मासे
घेऊन वर स्वर्गाकडे पाहून त्यांस आशीर्वाद दिला, आणि
तीं मोडून लोकसमुदायाला वाढण्याकरितां शिष्यांजवळ
दिलीं. १७ तेव्हां सर्व जण जेवून तृप्त झाले; आणि

उरलेले बारा टोपल्या तुकडे त्यांनीं उचलून नेले.

## येशू हा ख्रिस्त असल्याची पेत्रानें दिलेली कबुली

१८ नंतर असें झालें कीं तो एकांतीं प्रार्थना करीत असतां शिष्य त्याजबरोबर होते. तेव्हां त्यानें त्यांस विचारिलें; मी कोण आहें म्हणून लोक म्हणतात? १९ त्यांनीं उत्तर दिलें, बाप्तिस्मा करणारा योहान; कित्येक म्हणतात, एलीया; आणि कित्येक प्राचीन संदेष्ट्यांतील कोणी तरी उठला आहे असें म्हणतात. २० त्यानें त्यांस म्हटलें, पण तुम्ही मला कोण म्हणून म्हणतां? पेत्रानें उत्तर दिलें कीं देवाचा ख्रिस्त.

## आपल्या मरणाचें व पुनरुत्थानाचें भविष्य येशू वर्तवितो

२१ मग हें कोणाला सांगूं नका, अशी त्यानें त्यांस निक्षून आज्ञा केली, २२ आणि म्हटलें, मनुष्याच्या पुत्रानें बहुत दुःखें सोसावीं, वडील, मुख्य याजक व शास्त्री यांनीं त्याचा त्याग करावा, व त्याला जिवें मारावें, आणि त्यानें तिसऱ्या दिवशीं उठावें, याचें अगत्य आहे.

## 'स्व'ला फांटा देण्याबद्दल इशारा

२३ त्यानें सर्वांस म्हटलें, जर कोणी माझ्यामागें येऊं पाहतो तर त्यानें आत्मनिग्रह करावा, व प्रतिदिवशीं आपला वधस्तंभ उचलून घेऊन मला अनुसरावें. २४ जो कोणी आपला जीव वांचवूं पाहतो तो त्याला मुकेल; परंतु जो कोणी मजकरितां आपल्या जिवाला मुकेल, तो त्याला वांचवील. २५ कोणा मनुष्यानें सगळें जग मिळविलें, आणि स्वतःला गमाविलें किंवा आपला नाश करून घेतला तर त्याला काय लाभ? २६ जो कोणी माझी व माझ्या वचनांची लाज धरील त्याची लाज मनुष्याचा पुत्र स्वतःच्या, पित्याच्या व पवित्र देवदूतांच्या गौरवानें येईल तेव्हां धरील. २७ मी तुम्हांस सत्य सांगतों कीं एथें उभे राहणाऱ्यांतील कोणी असे आहेत कीं ते देवाचें राज्य पाहत तोंपर्यंत त्यांस मरणाचा अनुभव येणारच नाहीं.

## येशूचें रूपांतर

२८ या भाषणानंतर असें झालें कीं सुमारें आठ दिवसांनीं पेत्र, योहान व याकोब यांस बरोबर घेऊन तो प्रार्थना करावयास पर्वतावर गेला; २९ आणि तो प्रार्थना करीत असतां त्याच्या मुखाचें रूपांतर होऊन त्याचें वस्त्र पांढरें व चकचकीत झालें; ३० आणि पाहा, मोशे व एलीया हे दोघे जण त्याजबरोबर संभाषण करीत होते; ३१ ते तेजोमय दिसले; आणि तो जें आपलें निर्याण यरुशलेमांत पूर्ण करणार होता त्याविषयीं ते बोलत होते. ३२ तेव्हां पेत्र व त्याजबरोबरचे इसम झोपेनें गुंगून गेले होते; तरी त्यांनीं जागे होऊन त्याचें तेज व त्याच्याजवळ उभे राहिलेल्या दोघां पुरुषांस पाहिलें. ३३ मग असें झालें कीं त्यांचा त्याजपासून वियोग होत असतां पेत्रानें येशूला म्हटलें, गुरुजी, आपण एथें असावें हें बरें आहे; तर आम्ही तीन मंडप करूं; आपणासाठीं एक, मोशासाठीं एक व एलीयासाठीं एक; हें जें तो बोलला त्याचें त्याला भान नव्हतें. ३४ तो हें बोलत असतां मेघानें येऊन त्यांजवर छाया केली; आणि ते मेघांत प्रवेश करीत असतां भयभीत झाले. ३५ तेव्हां मेघांतून अशी वाणी झाली कीं हा माझा [प्रिय] पुत्र, माझा निवडलेला आहे; याचें तुम्ही ऐका. ३६ ही वाणी झाली तेव्हां येशू एकटाच दिसला. मग ते गप्प राहिले आणि ज्या गोष्टी त्यांनीं पाहिल्या होत्या त्यांतील कांहींच त्या दिवसांत त्यांनीं कोणाला सांगितलें नाहीं.

## भूतग्रस्त मुलाची रोगमुक्तता

३७ नंतर असें झालें कीं दुसऱ्या दिवशीं ते पर्वतावरून उतरल्यावर मोठा लोकसमुदाय त्याला येऊन भेटला. ३८ तेव्हां पाहा, समुदायांतून एक मनुष्य मोठ्यानें ओरडून म्हणाला, गुरुजी, मी आपणाला विनंति करितों, माझ्या पुत्राकडे पाहा; कारण तो माझा एकुलता एक आहे; ३९ आणि पाहा, कोणीसा आत्मा त्याला धरितो, आणि तो एकाएकीं ओरडतो; तो त्याला असा पिळतो कीं त्याला फेस येतो; त्याला पुष्कळ ठेचतो व त्याला लवकर

सोडीत नाहीं. ४० आपल्या शिष्यांनीं त्याला काढावें म्हणून मीं त्यांजकडे विनंति केली, परंतु त्यांना काढतां येईना. ४१ येशूनें उत्तर दिलें: हे अश्रद्धावान व विपरीत पिढी, मी कोठवर तुम्हांबरोबर राहूं व तुमचें सोसूं? तूं आपल्या पुत्राला इकडे आण. ४२ तो जवळ येत आहे इतक्यांत भूतानें त्याला आपटलें व पिळून टाकिलें. येशूनें त्या अशुद्ध आत्म्याला धमकाविलें; आणि मुलाला बरें करून त्याच्या बापाजवळ परत दिलें. ४३ ह्या देवाचा प्रताप पाहून सर्व लोक विस्मित झाले.

त्यानें केलेल्या सर्व कृत्यांवरून सर्व लोक आश्चर्य करीत असतां तो आपल्या शिष्यांस म्हणाला, ४४ या गोष्टी ऐकून ठेवा; कारण मनुष्याच्या पुत्राला लोकांच्या हातीं धरून देण्यांत येणार आहे. ४५ ही गोष्ट ते समजले नाहींत; ती त्यांस समजूं नये म्हणून त्यांजपासून ती गुप्त राखण्यांत आली होती; आणि या गोष्टीविषयीं त्याला विचारण्याची त्यांना भीति वाटली.

## नम्रता व परमतसहिष्णुता

४६ नंतर आपणांमध्यें कोण मोठा आहे याविषयीं त्यांच्यामध्यें वाटाघाट सुरू झाली. ४७ येशूनें त्यांच्या अंतःकरणांतील विचार ओळखून एका बाळकाला घेतलें आणि त्याला आपणाजवळ उभें केलें; ४८ मग त्यांस म्हटलें, जो कोणी या बाळकाला माझ्या नामानें स्वीकारितो, तो मला स्वीकारितो, आणि जो कोणी मला स्वीकारितो तो ज्यानें मला पाठविलें त्याला स्वीकारितो; तुम्हां सर्वांमध्यें जो कनिष्ठ आहे तोच श्रेष्ठ आहे.

४९ योहानानें म्हटलें, गुरुजी, आम्हीं एका इसमाला आपल्या नामानें भूतें काढतांना पाहिलें; तेव्हां आम्हीं त्याला मना केलें, कारण तो आम्हांला अनुसरत नव्हता. ५० येशूनें त्याला म्हटलें, त्याला मना करूं नका; कारण जो तुम्हांला प्रतिकूल नाहीं तो तुम्हांला अनुकूल आहे.

## येशू यरुशलेमास जावयास निघतो; आतिथ्य न करणारे शोमरोनी

५१ पुढें असें झालें कीं त्याचा वर घेतलें जाण्याचा समय जवळ आला तेव्हां त्यानें यरुशलेमास जाण्याचा दृढनिश्चय करून तिकडे आपलें तोंड वळविलें. ५२ त्यानें आपणापुढें निरोप्ये पाठविले; तेव्हां ते निघून त्याच्यासाठीं तयारी करावयास शोमरोन्यांच्या एका गांवांत गेले; ५३ परंतु त्यांनीं त्याचा स्वीकार केला नाहीं, कारण त्याचा रोख यरुशलेमाकडे जाण्याचा होता. ५४ हें पाहून त्याचे शिष्य याकोब व योहान म्हणाले, प्रभुजी, [ एलीयानें केल्याप्रमाणें ] आकाशांतून अग्नि पडून त्यांचा नाश व्हावा म्हणून आम्हीं आज्ञा करावी, अशी आपली इच्छा आहे काय? ५५ त्यानें वळून त्यांस धमकाविलें [ कीं तुम्ही कोणत्या आत्म्याचे आहां हें तुम्हांस ठाऊक नाहीं; ५६ कारण मनुष्याचा पुत्र माणसांच्या प्राणांचा नाश करावयास आला नाहीं, तर तारावयास आला. ] मग ते पुढें दुसऱ्या गांवास गेले.

## शिष्य होऊं इच्छिणाऱ्यांची कसोटी

५७ तेव्हां असें झालें कीं ते वाटेनें चालत असतां एकानें त्याला म्हटलें, आपण जेथें कोठें जाल तेथें मी आपल्यामागें येईन. ५८ येशू त्याला म्हणाला, खोकडांस बिळें व आकाशांतल्या पाखरांस कोटीं आहेत; परंतु मनुष्याच्या पुत्राला डोकें टेकण्यास ठिकाण नाहीं; ५९ त्यानें दुसऱ्या एकाला म्हटलें, माझ्यामागें ये; परंतु तो म्हणाला, प्रभुजी, पहिल्यानें मला माझ्या बापाला पुरावयास जाऊं द्या. ६० तो त्याला म्हणाला, मेलेल्यांना आपल्या मेलेल्यांस पुरूं दे; तूं जाऊन देवाच्या राज्याची घोषणा कर. ६१ त्यावर आणखी एकानें म्हटलें, प्रभुजी, मी आपल्यामागें येईन; परंतु पहिल्यानें मला आपल्या घरांतल्या मंडळीचा निरोप घेऊं द्या. ६२ येशूनें त्याला म्हटलें, जो कोणी नांगराला हात घातल्यावर मागें पाहतो तो देवाच्या राज्यास उपयोगी नाहीं.

## सत्तर शिष्यांची कामगिरी व त्यांचें पुनरागमन

**१०** १ ह्यानंतर प्रभूनें आणखी सत्तर जणांस नेमून ज्या ज्या नगरांत व ज्या ज्या ठिकाणीं तो स्वतः जाणार होता तेथें दोघे दोघे असें त्यांस आपणापुढें पाठविलें. २ तेव्हां त्यानें त्यांस म्हटलें, पीक फार आहे, परंतु कामकरी थोडके आहेत; यास्तव पिकाच्या धन्यानें आपल्या कापणीस कामकरी पाठवावे म्हणून त्याची प्रार्थना करा. ३ जा; पाहा, लांडग्यांमध्यें

कोकरांस पाठवावें तसें मी तुम्हांस पाठवितों. ४ पिशवी,
झोळी किंवा वाहणा आपल्याबरोबर घेऊं नका; वाटेनें
कोणाला मुजरा करूं नका. ५ ज्या कोणत्या घरांत जाल
तेथें, या घरास शांति असो, असें प्रथम म्हणा. ६ शांतीचा
पुत्र तेथें असला तर तुमची शांति त्याजवर राहील;
नसला तर तुम्हांकडे ती परत येईल. ७ त्याच घरांत
वस्ती करून ते जें देतील तें खातपीत राहा; कामकरी
आपल्या मजुरीला योग्य आहे; घरोघर फिरूं नका.
८ कोणत्याहि नगरांत तुम्ही गेलां, आणि त्यांनीं तुमचा
स्वीकार केला तर ते जें तुम्हांस वाढतील तें खा; ९ त्यांत
जे दुखणाईत असतील त्यांस बरें करा, व त्यांस सांगा
कीं देवाचें राज्य तुम्हांजवळ आलें आहे. १० तुम्ही
कोणत्याहि नगरांत गेलां, आणि त्यांनीं तुम्हांस स्वीकारिलें
नाहीं तर त्यांच्या मार्गांत बाहेर जाऊन असें म्हणा,
११ आमच्या पायांस लागलेली तुमच्या नगरची धूळ ती
देखील तुमची तुम्हांस झाडून टाकितों; तथापि हें लक्षांत
ठेवा कीं देवाचें राज्य जवळ आलें आहे. १२ मी तुम्हांस
सांगतों, त्या नगरापेक्षां सदोमाला त्या दिवशीं सोपें पडेल.
१३ हे खोराजिना, तुला धिक्कार असो! हे बेथ्सैदा,
तुला धिक्कार असो! कारण तुम्हांमध्यें जीं पराक्रमाचीं
कृत्यें घडलीं तीं सोर व सीदोन यांत घडलीं असतीं तर
त्यांनीं तरट व राख अंगावर घेऊन व बसून मागेंच
पश्चात्ताप केला असता. १४ यावरून न्यायकाळीं तुमच्या-
पेक्षां सोर व सीदोन यांस सोपें पडेल. १५ हे कफर्णहूमा,
'तूं आकाशापर्यंत चढविलें जाशील काय? तूं अधोलोकापर्यंत
खालीं टाकिलें जाशील.' १६ जो तुमचें ऐकतो तो माझें
ऐकतो; जो तुमचा नाकार करितो, तो माझा नाकार
करितो; आणि जो माझा नाकार करितो तो ज्यानें मला
पाठविलें त्याचा नाकार करितो.

१७ नंतर ते सत्तर जण आनंदानें माघारे येऊन
म्हणाले, प्रभुजी, आपल्या नामानें भूतें देखील आम्हांस
वश होतात. १८ तेव्हां त्यानें त्यांस म्हटलें, मीं सैता-
नाला आकाशांतून विजेसारिखें पडलेलें पाहिलें. १९ पाहा,
मीं तुम्हांस 'साप' व विंचू यांस 'तुडविण्याचा' आणि
शत्रूच्या सर्व शक्तीवरचा अधिकार दिला आहे; तुम्हांस
कांहींएक बाधणार नाहीं. २० तथापि भूतें तुम्हांस वश
होतात याचा आनंद मानूं नका; तर तुमचीं नांवें स्वर्गांत
लिहिलीं आहेत याचा आनंद माना.

## येशूनें केलेलें ईशोपकारस्मरण

२१ त्याच घटकेस तो पवित्र आत्म्यांत उल्लसित होऊन
म्हणाला, हे बापा, स्वर्गाच्या व पृथ्वीच्या प्रभू, मी तुझें
उपकारस्मरण करितों; कारण तूं ज्ञानी व विचारवंत
यांपासून या गोष्टी गुप्त ठेवून बाळकांस प्रगट केल्या;
होय, बापा, कारण तुला असेंच योग्य दिसलें. २२ माझ्या
बापानें माझ्या हातीं सर्व कांहीं सोपलें आहे; पुत्र कोण
आहे हें बापावांचून कोणाला ठाऊक नाहीं; आणि बाप
कोण आहे हें पुत्रावांचून व ज्याला तो प्रगट करावयाची
पुत्राची इच्छा असेल त्याच्यावांचून कोणाला ठाऊक नाहीं.
२३ मग शिष्यांकडे फिरून तो एकांतीं म्हणाला, तुम्ही जें
पाहतां तें जे डोळे पाहतात ते धन्य; २४ मी तुम्हांस
सांगतों, जें तुम्ही पाहतां तें पुष्कळ संदेष्ट्यांनीं व राजांनीं
पाहावयाची इच्छा बाळगली तरी पाहिलें नाहीं; आणि
जें तुम्ही ऐकतां तें ऐकावयाची इच्छा बाळगली तरी
ऐकलें नाहीं.

## शाश्वत जीवनप्राप्ति कशी करून घ्यावी?

२५ मग पाहा, कोणीएक शास्त्री उभा राहून त्याची
परीक्षा पाहण्याकरितां म्हणाला, गुरुजी, काय केल्यानें मला
सार्वकालिक जीवन हें वतन मिळेल? २६ त्यानें त्याला
म्हटलें, नियमशास्त्रांत काय लिहिलें आहे? तूं काय वाचि-
तोस? २७ त्यानें उत्तर दिलें 'तूं आपला देव परमेश्वर
याजवर पूर्ण मनानें, पूर्ण जिवानें, पूर्ण शक्तीनें व पूर्ण
बुद्धीनें प्रीति कर;' आणि 'जशी आपणावर तशी आपल्या
शेजाऱ्यावर प्रीति कर.' २८ त्यानें त्याला म्हटलें, ठीक
उत्तर केलेंस; 'हेंच कर' म्हणजे 'वांचशील;' २९ परंतु
स्वतःस धार्मिक ठरवून घ्यावें अशी इच्छा धरून तो
येशूला म्हणाला, माझा शेजारी तो कोण?

## चांगल्या शोमरोन्याचा दृष्टांत

३० येशूनें उत्तर दिलें, एक मनुष्य यरुशलेमाहून
खालीं यरीहोस जात असतां लुटारूंच्या हातीं सांपडला,
त्यांनीं त्याचीं वस्त्रें काढून घेऊन त्याला ठोकहि दिला,

आणि अर्धमेला टाकून ते निघून गेले. ३१ मग एक
याजक त्याच वाटेनें सहज खालीं जात होता; तो त्याला
पाहून दुसऱ्या बाजूनें चालता झाला. ३२ तसाच एक
लेवीहि त्या ठिकाणीं येऊन त्याला पाहून दुसऱ्या बाजूनें
चालता झाला. ३३ मग एक शोमरोनी त्या वाटेनें चालला
असतां, तो होता तेथें आला, आणि त्याला पाहून त्यास
त्याचा कळवळा आला; ३४ त्यानें जवळ जाऊन त्याच्या
जखमांस तेल व द्राक्षारस लावून त्या बांधिल्या, आणि
त्याला आपल्या पाठीवर बसवून उतारशाळेंत आणिलें,
व त्याचा संभाळ केला. ३५ दुसऱ्या दिवशीं निघतेवेळेस
त्यानें दोन पावल्या काढून उतारशाळेच्या रक्षकाला देऊन
म्हटलें, याचा संभाळ कर; आणि यापेक्षां जें कांहीं अधिक
खर्चिशील तें मी माघारें आल्यावर तुला देईन. ३६ तर
लुटारूंच्या हातीं सांपडलेल्या इसमाचा शेजारी या तिघांतून
तुझ्या मतें कोण झाला ? ३७ तो म्हणाला, त्याजवर दया
करणारा तो. येशूनें त्याला म्हटलें, तूं जाऊन तसेंच कर.

## मार्था आणि मरीया

३८ ते जात असतां तो एका गांवांत आला; तेव्हां
मार्था नामें एका स्त्रीनें त्याला आपल्या घरांत घेतलें. ३९
तिला मरीया नांवाची एक बहीण होती, ती प्रभूच्या
चरणांजवळ बसून त्याचे शब्द ऐकत राहिली. ४० तेव्हां
मार्थेला फार खटपट पडल्यामुळें तिची तारांबळ उडाली
आणि ती जवळ येऊन म्हणाली, प्रभुजी, माझ्या बहिणीनें
मज एकटीवर कामाचा बोजा टाकिला आहे, याची आप-
णाला काळजी नाहीं काय ? तिला मला साहाय्य करावयास
सांग. ४१ प्रभूनें तिला उत्तर दिलें, मार्थे, मार्थे, तूं
पुष्कळ गोष्टींविषयीं काळजी व दगदग करतेस; ४२ परंतु
थोड्याच गोष्टींचें, किंबहुना एकाच गोष्टीचें अगत्य आहे;
मरीयेनें चांगला वांटा निवडून घेतला आहे, तो तिजपासून
घेतला जाणार नाहीं.

## प्रभूची प्रार्थना

१ मग असें झालें कीं तो एका ठिकाणीं
११ प्रार्थना करीत होता, आणि ती त्यानें समाप्त
केल्यावर त्याच्या शिष्यांतील एकानें त्याला
म्हटलें, प्रभुजी, जसें योहानानें आपल्या शिष्यांस प्रार्थना
करावयास शिकविलें तसें आपणहि आम्हांस शिकवा. २
तो त्यांस म्हणाला, तुम्ही प्रार्थना कराल तेव्हां असें म्हणा :
हे [आमच्या स्वर्गांतील] पित्या, तुझें नाम पवित्र
मानिलें जावो; तुझें राज्य येवो; [जसें स्वर्गांत तसें पृथ्वी-
वरहि तुझ्या इच्छेप्रमाणें होवो;] ३ आमची प्रतिदिवसाची
भाकर प्रतिदिवशीं आम्हांस दे; ४ आणि आमच्या पापांची
क्षमा कर, कारण आम्ही आपल्या प्रत्येक ऋण्याला क्षमा
करितों; आम्हांस परीक्षेंत आणूं नको; [तर आम्हांस
वाईटापासून सोडीव.]

## आग्रहाची प्रार्थना व मध्यरात्रीं आलेल्या मित्राचा दृष्टांत

५ मग त्यानें त्यांस म्हटलें, तुम्हांमध्यें असा कोण आहे
कीं त्याला मित्र असून तो त्याजकडे मध्यरात्रीं जाऊन
त्याला म्हणतो, गड्या, मला तीन भाकरी उसन्या दे; ६
कारण माझा एक मित्र प्रवासाहून मजकडे आला आहे,
आणि त्याला वाढावयास मजजवळ कांहीं नाहीं; ७ आणि
तो आंतून उत्तर देईल, मला श्रम देऊं नको; आतां दार
लाविलें आहे व माझीं मुलें माझ्याजवळ निजलीं आहेत;
माझ्यानें उठून तुला देववत नाहीं ? ८ मी तुम्हांस सांगतों,
तो त्याचा मित्र आहे यामुळें जरी तो उठून त्याला देणार
नाहीं, तरी त्याच्या आग्रहामुळें जें कांहीं पाहिजे तें उठून
त्याला देईल. ९ मी तुम्हांस सांगतों, मागा म्हणजे तुम्हांस
दिलें जाईल; शोधा म्हणजे तुम्हांस सांपडेल; ठोका म्हणजे
तुम्हांस उघडलें जाईल; १० कारण जो कोणी मागतो
त्याला मिळतें, जो शोधितो त्याला सांपडतें, जो कोणी
ठोकितो त्याच्यासाठीं उघडलें जातें; ११ तुम्हांमध्यें असा
कोण बाप आहे कीं त्याच्याजवळ त्याच्या मुलानें भाकर
मागितली असता तो त्याला धोंडा देईल ? अगर मासा
मागितला असतां मासा न देतां त्याला साप देईल ? १२
किंवा अंडें मागितलें असतां त्याला विंचू देईल ? १३ तर
तुम्ही वाईट असतां तुम्हांला आपल्या मुलांना चांगल्या
देणग्या द्यावयाचें कळतें, तर मग स्वर्गीय पित्या-
जवळ जे मागतात त्यांस तो किती विशेषेंकरून पवित्र
आत्मा देईल ?

## सैतानाच्या साहाय्यानें येशू आपलीं कामें करतो या आरोपाला दिलेलें उत्तर

१४ एकदा तो एक भूत काढीत होता, तें मुकें होतें. तेव्हां असें झालें कीं भूत निघाल्यावर मुका बोलूं लागला; त्यावरून लोकसमुदायांस आश्चर्य वाटलें. १५ तरी त्यांतील कित्येक म्हणाले, भूतांचा अधिपति जो बालजबूल त्याच्या साह्यानें हा भूतें काढितो. १६ दुसऱ्या कित्येकांनीं त्याची परीक्षा पाहण्याकरितां त्याच्याजवळ आकाशांतील चिन्ह मागितलें; १७ परंतु त्यानें त्यांच्या मनांतील कल्पना जाणून त्यांस म्हटलें, आपसांत फूट पडलेलें कोणतेंहि राज्य ओसाड पडतें आणि घरावर घर पडतें. १८ सैतानांतहि फूट पडली तर त्याचें राज्य कसें टिकेल? कारण, मी बालजबूलाच्या साह्यानें भूतें काढितों, असें तुम्ही म्हणतां. १९ मी बालजबूलाच्या साह्यानें भूतें काढितों तर तुमचे पुत्र कोणाच्या साह्यानें काढितात? यामुळें ते तुमचा न्याय करितील; २० परंतु मी जर देवाच्या सामर्थ्यानें[1] भूतें काढितों तर देवाचें राज्य तुम्हांवर येऊन चुकलें आहे. २१ जेव्हां हत्यारबंद बळकट मनुष्य आपल्या वाड्याची रखवाली करितो तेव्हां त्याची मालमत्ता निर्भय राहते; २२ तरी त्याच्यापेक्षां बळकट असा एकादा मनुष्य त्याजवर येऊन त्याला जिंकितो तेव्हां ज्या शस्त्रसामग्रीवर त्यानें भरवसा ठेवला होता ती तो घेऊन जातो, व त्यानें लुटून आणलेली चीजवस्त वांटून टाकतो. २३ जो मला अनुकूल नाहीं तो मला प्रतिकूल आहे; आणि जो माझ्याबरोबर गोळा करीत नाहीं तो उधळतो.

## अपुऱ्या सुधारणेपासून उद्भवणारा धोका

२४ मनुष्यांतून अशुद्ध आत्मा निघाला म्हणजे तो निर्जन स्थळीं विश्रांतीचा शोध करीत हिंडतो; आणि ती न मिळाली म्हणजे म्हणतो, ज्या माझ्या घरांतून मी निघालों त्यांत परत जाईन; २५ आणि तो आल्यावर तें झाडलेलें व सुशोभित केलेलें आहे असें पाहतो. २६ नंतर तो जाऊन आपणापेक्षां दुष्ट असे सात आत्मे बरोबर घेतो; आणि ते आंत शिरून तेथें राहतात, मग त्या मनुष्याची शेवटली दशा पहिल्या दशेपेक्षां वाईट होते.

२७ तो या गोष्टी बोलत असतां असें झालें कीं लोकसमुदायांतील कोणीएक स्त्री उच्च स्वरानें त्याला म्हणाली, ज्या ओटीनें आपला भार वाहिला व जीं स्तनें आपण चोखिलीं तीं धन्य. २८ तो म्हणाला, जे देवाचें वचन ऐकून तें पाळितात तेच धन्य.

## चिन्हें मागण्याविषयीं दिलेला इशारा

२९ तेव्हां लोकसमुदाय त्याच्याजवळ एकत्र जमत असतां तो असें म्हणूं लागला, ही पिढी वाईट आहे, ही चिन्ह मागते; परंतु योनाच्या चिन्हावांचून तिला चिन्ह मिळणार नाहीं. ३० कारण जसा योना निनवेकरांस चिन्ह झाला तसा मनुष्याचा पुत्र या पिढीला होईल. ३१ दक्षिणेची राणी न्यायकाळीं या पिढीच्या लोकांबरोबर उठून त्यांस दोषी ठरवील; कारण शलमोनाचें ज्ञान ऐकावयास ती पृथ्वीच्या सीमेपासून आली; तर पाहा, शलमोनापेक्षां श्रेष्ठ असा कोणी एथें आहे. ३२ निनवेचे लोक न्यायकाळीं या पिढीच्याबरोबर उभे राहून हिला दोषी ठरवितील; कारण त्यांनीं योनाच्या उपदेशावरून पश्चात्ताप केला; तर पाहा, योनापेक्षां श्रेष्ठ असा कोणी येथें आहे.

## दिव्यावरून धडे

३३ कोणी दिवा लावून तळघरांत किंवा मापाखालीं ठेवीत नाहीं, तर आंत येणाऱ्यांस उजेड दिसावा म्हणून दिवठणीवर ठेवितो. ३४ तुझ्या शरीराचा दिवा तुझा डोळा आहे; तुझा डोळा निर्दोष असला तर तुझें सर्व शरीर प्रकाशमय आहे; वाईट असला तर तुझें शरीरहि अंधकारमय आहे. ३५ यास्तव तुझ्यामध्यें जो प्रकाश आहे तो अंधार तर नसेलना, हें पाहा. ३६ तुझें सर्व शरीर प्रकाशमय असलें, म्हणजे त्याचा कोणताहि भाग अंधकारमय नसला, तर दिव्याच्या ज्योतीनें तुला प्रकाश प्राप्त होतो त्याप्रमाणें तें पूर्ण प्रकाशमय होईल.

## परूशी व शास्त्री यांचा येशू जाहीरपणें निषेध करतो

३७ तो बोलत आहे इतक्यांत एका परूश्यानें त्याला आपल्या एथें भोजनास येण्याची विनंति केली;

[1] मुळांत: देवाच्या बोटानें

मग तो आंत जाऊन भोजनास बसला. ३८ त्यानें
भोजनापूर्वी स्नान केलें नाहीं असें पाहून परूश्याला
आश्चर्य वाटलें; ३९ परंतु प्रभूनें त्याला म्हटलें, तुम्ही
परूशी तारवाटी बाहेरून स्वच्छ करितां; परंतु तुमचा
अंतर्भाग अपहार व दुष्टपणा यांनीं भरला आहे. ४०
अहो मूर्खांनो; ज्यानें बहिर्भाग केला त्यानें अंतर्भागहि
केला नाहीं काय! ४१ तर जें आंत आहे त्याचा
दानधर्म करा म्हणजे, पाहा, सर्व तुम्हांस शुद्ध आहे.

४२ तुम्हां परूश्यांस धिक्कार असो! तुम्ही पुदिना,
सताप व प्रत्येक भाजी यांचा दशांश देतां, पण न्याय व
देवाची प्रीति यांची उपेक्षा करितां; या गोष्टी कराव-
याच्या होत्या, व त्या सोडावयाच्या नव्हत्या. ४३
तुम्हां परूश्यांस धिक्कार असो! सभास्थानांमध्यें श्रेष्ठ
आसनें व बाजारांत नमस्कार घेणें हीं तुम्हांस आव-
डतात. ४४ तुम्हांस धिक्कार असो! ज्या अदृश्य
कबरांवरून माणसें न समजतां चालतात त्यांसारखे
तुम्ही आहां.

४५ तेव्हां शास्त्र्यांतील कोणीएकानें त्याला म्हटलें,
गुरुजी, आपण असें बोलून आमचीहि निंदा करितां.
४६ तो म्हणाला, तुम्हां शास्त्र्यांसहि धिक्कार असो!
वाहावयास अवघड अशीं ओझीं तुम्ही माणसांवर
लादितां, आणि स्वतः आपलें एक बोट देखील त्या
ओझ्यांस लावीत नाहीं. ४७ तुम्हांस धिक्कार असो!
तुम्ही संदेष्ट्यांचीं थडगीं बांधितां, आणि त्यांस तर
तुमच्या पूर्वजांनीं जिवें मारिलें. ४८ तुम्ही साक्षीदार
आहां व आपल्या पूर्वजांच्या कर्मांस मान्य आहां,
कारण त्यांनीं त्यांस जिवें मारिलें व तुम्ही त्यांचीं
थडगीं बांधितां. ४९ देवज्ञानानेंहि म्हटलें, मी त्यांजकडे
संदेष्टे व प्रेषित पाठवीन, आणि त्यांच्यांतील कित्ये-
कांस ते जिवें मारितील व छळितील; ५० यासाठीं
कीं जगाच्या स्थापनेपासून त्या सर्व संदेष्ट्यांचें रक्त,
५१ म्हणजे हाबेलाच्या रक्तापासून वेदीच्या व पवित्र-
स्थानाच्यामध्यें ज्या जखऱ्याचा घात झाला त्याच्या
रक्तापर्यंत जें रक्त पाडिलें गेलें त्याचा हिशेब या
पिढीपासून घेतला जावा; हो, मी तुम्हांस सांगतों,
त्याचा हिशेब या पिढीपासून घेतला जाईलच. ५२
तुम्हां शास्त्र्यांस धिक्कार असो! तुम्ही ज्ञानाची किल्ली
घेऊन गेलां; तुम्ही स्वतः आंत गेलां नाहीं व जे
आंत जात होते त्यांस तुम्हीं अटकाव केला.

५३ तो तेथून बाहेर आल्यावर शास्त्री व परूशी
आवेशानें त्याच्या अंगावर येऊन त्यानें पुष्कळशा
गोष्टींविषयीं बोलावें म्हणून त्याला चिडवूं लागले; ५४
आणि त्याच्या तोंडून कांहीं निघाल्यास त्याला पकडावें
म्हणून टपून राहिले.

### ढोंगाच्या बाबत येशू आपल्या शिष्यांस इशारा देतो

**१२** १ इतक्यांत हजारों लोकांची इतकी गर्दी
झाली कीं ते एकमेकांस तुडवूं लागले; तेव्हां
येशू आपल्या शिष्यांस पहिल्यानें असें सांगूं
लागला, तुम्ही आपणांस परूश्यांच्या खमिराविषयीं
म्हणजे ढोंगाविषयीं संभाळा. २ जें प्रगट होणार
नाहीं असें कांहीं झाकलेलें नाहीं, व जें कळणार
नाहीं, असें कांहीं गुप्त नाहीं; ३ जें कांहीं तुम्ही
अंधारांत बोलला तें उजेडांत ऐकण्यांत येईल, आणि
जें तुम्हीं आंतल्या कोठडीत कानीं सांगितलें असेल
तें धाब्यांवर गाजविलें जाईल.

### तो आपल्या शिष्यांस धैर्य देतो

४ तुम्हां माझ्या मित्रांस मी सांगतों, जे शरीराचा
वध करितात पण त्यानंतर ज्यांच्यानें आणखी कांहीं
करवत नाहीं त्यांची भीति बाळगूं नका. ५ तुम्हीं
कोणाची भीति बाळगावी हें मी तुम्हांस सुचवितों;
जीव घेतल्यावर नरकांत टाकावयास ज्याला सामर्थ्य
आहे त्याची भीति बाळगा; हो, मी तुम्हांस सांगतों
त्याचीच भीति बाळगा. ६ पांच चिमण्या दोन दम-
ड्यांस विकतात कीं नाहींत? तरी त्यांतून एकीलाहि
देव विसरत नाहीं. ७ फार तर काय, तुमच्या
डोक्याचे केसहि सर्व मोजलेले आहेत. भिऊं नका;
तुम्ही बहुत चिमण्यांपेक्षां मोलवान् आहां. ८ मी
तुम्हांस सांगतों, जो कोणी मला मनुष्यांसमोर
स्वीकारील त्याला मनुष्याचा पुत्रहि देवाच्या

दूतांसमोर स्वीकारील; ९ परंतु ज्यानें मला मनुष्यांसमोर
नाकारिलें तो देवाच्या दूतांसमोर नाकारिला जाईल; १०
आणि जो कोणी मनुष्याच्या पुत्राविरुद्ध कांहीं बोलेल त्याला
त्याची क्षमा होईल; परंतु जो पवित्र आत्म्याविरुद्ध दुर्भा-
षण करितो त्याला त्याची क्षमा होणार नाहीं. ११ जेव्हां
तुम्हांस सभा, सरकार व अधिकारी यांसमोर नेतील, तेव्हां
कसें काय उत्तर द्यावें किंवा काय बोलावें याविषयीं काळजी
करूं नका. १२ कारण तुम्हीं काय बोलावें तें पवित्र आत्मा
त्याच घटकेस तुम्हांस शिकवील.

### द्रव्यलोभ व श्रीमंत मूर्ख मनुष्याचा दृष्टांत

१३ लोकसमुदायांतील कोणीएकानें त्याला म्हटलें,
गुरुजी, मला आपल्या वतनाचा विभाग द्यावा म्हणून माझ्या
भावाला सांगा. १४ तो त्याला म्हणाला, गृहस्था, मला
तुम्हांवर न्यायाधीश किंवा वांटणी करणारा कोणीं नेमिलें?
१५ आणखी त्यानें त्यांस म्हटलें, सांभाळा, सर्व प्रकारच्या
लोभापासून दूर राहा; कोणाला पुष्कळ संपत्ति असली तर
ती त्याचें जीवन होतें असें नाहीं. १६ त्यानें त्यांस एक
दाखला सांगितला: कोणीएका धनवान् मनुष्याच्या जमि-
नीला फार पीक आलें. १७ तेव्हां त्यानें आपल्या मनांत
असा विचार केला कीं, मी काय करूं? कारण माझें उत्पन्न
साठवावयास मला जागा नाहीं. १८ मग त्यानें म्हटलें, मी
असें करीन, आपलीं कोठारें मोडून मोठीं बांधीन; आणि
तेथें मी आपलें सर्व धान्य व माल साठवीन. १९ मग
मी आपल्या जिवाला म्हणेन, हे जिवा, तुला पुष्कळ वर्षे
पुरेल इतका पुष्कळ माल ठेविलेला आहे; विसावा घे, खा,
पी, आनंद कर; २० परंतु देवानें त्याला म्हटलें, अरे मूर्खा,
आज रात्रीं तुला देवाज्ञा होईल; तेव्हां जें कांहीं तूं सिद्ध
केलें आहे, तें कोणाचें होईल? २१ जो कोणी आपणा-
साठीं द्रव्यसंचय करितो व देवविषयक बाबतींत धनवान्
नाहीं तो तसाच आहे.

### चिंतेबाबत इशारा

२२ तेव्हां त्यानें आपल्या शिष्यांस म्हटलें, यास्तव मी
तुम्हांस सांगतों, आपण काय खावें अशी जिवाविषयीं,
अथवा आपण काय पांघरावें अशी आपल्या शरीराविषयीं,
काळजी करूं नका; २३ कारण अन्नापेक्षां जीव व वस्त्रापेक्षां
शरीर कांहीं विशेष आहे. २४ कावळ्यांकडे लक्ष द्या; ते
पेरीत नाहींत व कापणीहि करीत नाहींत; त्यांस कळंद नाहीं
व कोठारहि नाहीं; तरी देव त्यांचें पोषण करितो; पक्ष्यां-
पेक्षां तुम्ही किती तरी श्रेष्ठ आहां! २५ तसेंच काळजी
करून आपल्या आयुष्याची दोरी हातभर वाढवावयास
तुम्हांमध्यें कोण समर्थ आहे? २६ यास्तव अति लहान
गोष्ट देखील तुमच्यानें होत नाहीं तर वरकड गोष्टींविषयीं
कां काळजी करितां? २७ भूकमलें कशीं वाढतात हें
लक्षांत आणा; तीं कष्ट करीत नाहींत, व कांतीतहि नाहींत;
मी तुम्हांस सांगतों, शलमोन देखील आपल्या सर्व वैभवांत
त्यांतल्या एकासारिखाहि सजला नव्हता. २८ रानांतलें
गवत जें आज आहे व उद्यां भट्टींत पडतें त्याला जर देव
असा पोषाख घालितो, तर अहो अल्पश्रद्धावान् जनहो, तो
किती विशेषेंकरून तुम्हांस घालील? २९ तसेंच काय खावें
किंवा काय प्यावें याच्यामागें लागूं नका अगर अस्वस्थ-
चित्त असूं नका. ३० कारण जगांतील राष्ट्रें ह्या सर्व
गोष्टींच्या मागें लागतात; परंतु तुम्हांस त्यांची गरज आहे
हें तुमच्या पित्यास ठाऊक आहे. ३१ तर तुम्ही त्याच्या
राज्याच्या मागें लागा, म्हणजे त्याबरोबर हींहि तुम्हांस
मिळतील. ३२ हे लहान कळपा, भिऊं नको; कारण तुम्हांस
राज्य द्यावें हें तुमच्या पित्याला बरें वाटतें. ३३ जें तुमचें
आहे तें विकून दानधर्म करा; जीर्ण न होणाऱ्या थैल्या,
तसेंच स्वर्गांतील अक्षय धन, आपणांसाठीं करून ठेवा;
तेथें चोर येत नाहीं व कसर लागत नाहीं. ३४ जेथें तुमचें
धन आहे तेथें तुमचें मनहि लागेल.

### जागृतीची आवश्यकता, व इमानी कारभाऱ्याचा दृष्टांत

३५ तुमच्या कमरा बांधिलेल्या व दिवे लाविलेले असा-
वेत; ३६ धनी येऊन दार ठोकील तेव्हां आपण त्याजसाठीं
तत्काळ उघडावें म्हणून, तो लग्नाहून माघारा येण्याची वाट
पाहत बसणाऱ्या मनुष्यांसारखे तुम्ही व्हा. ३७ धनी येऊन
ज्या दासांस जागृत असलेलें पाहील ते धन्य; मी तुम्हांस
खचीत सांगतों कीं तो कमर बांधून त्यांस जेवावयास बस-
वील आणि येऊन त्यांची सेवा करील. ३८ तो रात्रीच्या
दुसऱ्या किंवा तिसऱ्या प्रहरीं येऊन त्यांस असें पाहील तर

ते धन्य आहेत. ३९ आणखी हें समजून घ्या कीं अमक्या घटकेस चोर येईल हें घरधन्याला कळलें असतें, तर तो जागृत राहिला असता, आणि त्यानें आपलें घर फोडूं दिलें नसतें. ४० तुम्हीहि सिद्ध असा, कारण तुम्हांस वाटत नाहीं त्या घटकेस मनुष्याचा पुत्र येईल.

४१ तेव्हां पेत्रानें म्हटलें, प्रभुजी, हा दाखला आपण आम्हांस सांगतां किंवा सर्वांसहि सांगतां? ४२ तेव्हां प्रभु म्हणाला, आपल्या परिवाराला यथाकालीं शिधासामग्री द्यावयास ज्याला धन्यानें नेमिलें आहे असा विश्वासू व विचारशील कारभारी कोण? ४३ ज्या दासाला त्याचा धनी येऊन तसें करितांना पाहील तो धन्य. ४४ मी तुम्हांस सत्य सांगतों कीं त्याला तो आपल्या सर्वस्वावर नेमील; ४५ परंतु आपला धनी येण्यास उशीर लागेल असें तो दास आपल्या मनांत म्हणून चाकरांस व चाकरिणींस मारूं लागेल, आणि खाऊंपिऊं व मस्त होऊं लागेल; ४६ तर तो वाट पाहत नाहीं त्या दिवशीं व त्याला ठाऊक नाहीं त्या घटकेस त्या दासाचा धनी येऊन त्याला कापून टाकील, आणि अविश्वासू लोकांबरोबर त्याचा वांटा नेमील. ४७ आपल्या धन्याची इच्छा काय आहे हें माहीत असून ज्या दासानें तयारी केली नाहीं व त्याच्या इच्छेप्रमाणें कृति केली नाहीं तो फार फटके खाईल; ४८ परंतु ज्यानें फटके मारण्याजोगीं कृत्यें, माहिती नसल्यामुळें केलीं, तो थोडके खाईल. ज्या कोणाला फार दिलें त्याजजवळून फार मागण्यांत येईल, आणि ज्याच्याजवळ फार ठेविलें आहे त्याजजवळून फारच फार मागण्यांत येईल.

## काळाचीं लक्षणें

४९ मी पृथ्वीवर आग लावण्यास आलों आहे, ती पेटून चुकली असती तर किती बरें होतें? ५० मला बाप्तिस्मा घ्यावयाचा आहे, तो केव्हां परिपूर्ण होईल अशा मोठ्या पेचांत मी पडलों आहें! ५१ मी पृथ्वीवर शांतता करावयास आलों आहें असें तुम्हांस वाटतें काय? मी तुम्हांस सांगतों, नाहीं; तर फूट करावयास; ५२ आतांपासून एका घरांतील पांच जणांत, दोघांविरुद्ध तिघे व तिघांविरुद्ध दोघे असे विभक्त होतील. ५३ पुत्राविरुद्ध पिता व 'पित्याविरुद्ध पुत्र,' कन्येविरुद्ध माता व 'मातेविरुद्ध कन्या,' सासूविरुद्ध सून व 'सुनेविरुद्ध सासू' अशीं तीं विभक्त होतील.

५४ आणखी तो लोकसमुदायांसहि म्हणाला, जेव्हां तुम्ही ढग पश्चिमेकडून वर येतांना पाहतां तेव्हां लागलेंच म्हणतां, सर येत आहे; आणि तसें घडतें. ५५ दक्षिण वारा सुटतो तेव्हां तुम्ही म्हणतां, कडाक्याचा उष्मा होईल; आणि तसें घडतें. ५६ अहो ढोंग्यांनो, तुम्हांस पृथ्वीवरील व आकाशांतील लक्षणांचा अर्थ काढितां येतो, तर ह्या समयाचा अर्थ तुम्हांस कसा काढितां येत नाहीं? ५७ आणखी जें यथार्थ आहे तें तुम्ही आपणच कां ठरवीत नाहीं? ५८ तूं आपल्या वाद्याबरोबर अधिकाऱ्याकडे जातांना वाटेंतच त्याजपासून सुटावयाचा यत्न कर; नाहींतर कदाचित तो तुला न्यायाधीशाकडे ओढून नेईल; न्यायाधीश तुला शिपायाच्या हातीं देईल, व शिपाई तुला बंदिशाळेंत घालील. ५९ मी तुला सांगतों, तूं शेवटली टोलीहि फेडीपर्यंत तेथून सुटणारच नाहींस.

## पश्चात्ताप करण्याविषयींचा बोध

१३ १ त्याच समयीं तेथें असणाऱ्या कित्येकांनीं त्याला, ज्या गालीलकरांचें रक्त पिलातानें त्यांच्या यज्ञांत मिश्रित केलें होतें, त्यांजविषयीं सांगितलें. २ त्यानें त्यांस उत्तर दिलें, या गालीलकरांनीं असें दुःख भोगिलें यावरून दुसऱ्या सर्व गालीलकरांपेक्षां ते पापी होते असें तुम्हांस वाटतें काय? ३ मी तुम्हांस सांगतों, नव्हते; तरी पण तुम्हीं पश्चात्ताप न केल्यास सर्व त्याप्रमाणें नाश पावाल; ४ किंवा ज्या अठरा जणांवर शिलोहांतील बुरूज पडून त्यांचा घात झाला, ते यरुशलेमांत राहणाऱ्या सर्व मनुष्यांपेक्षां अपराधी होते असें तुम्हांस वाटतें काय? ५ मी तुम्हांस सांगतों, नव्हते; तरी पण तुम्हीं पश्चात्ताप न केल्यास सर्व तसाच नाश पावाल.

## निष्फळ अंजिराच्या झाडाचा दृष्टांत

६ त्यानें हा दाखला सांगितला: कोणाएकाचें द्राक्षमळ्यांत लाविलेलें अंजिराचें एक झाड होतें; त्यावर तो फळ पाहावयास आला परंतु त्याला मिळालें नाहीं.

७ तेव्हां त्यानें माळ्याला म्हटलें, पाहा, मी आज तीन
वर्षें या अंजिरावर फळ पाहावयास येतों परंतु मला
कांहीं आढळत नाहीं; तें तोडून टाक; भूमीला उगाच
भार तरी कां असावा ? ८ तेव्हां त्यानें त्याला
उत्तर दिलें, महाराज, यंदाचेंहि वर्ष तें असूं द्या,
म्हणजे मी त्याच्याभोवतें खणून खत घालीन; ९ मग
त्याला फळ आलें तर बरें; नाहींतर आपण तें
तोडून टाकावें.

### शब्बाथ दिवशीं रोगमुक्त केलेली बाई

१० तो शब्बाथ दिवशीं एका सभास्थानांत
शिकवीत होता. ११ तेव्हां पाहा, जिला अठरा वर्षें
विकाराचा आत्मा लागला होता अशी एक स्त्री तेथें
होती; ती कुबडी असल्यामुळें तिला अगदीं उभें
राहवत नसे. १२ तिला येशूनें पाहून बोलावून
म्हटलें, बाई, तूं आपल्या विकारापासून मुक्त झाली
आहेस. १३ त्यानें तिजवर हात ठेवितांच ती सरळ
झाली व देवाचा महिमा वर्णूं लागली. १४ येशूनें
शब्बाथ दिवशीं रोग बरा केला म्हणून सभास्थानाचा
अधिकारी संतप्त होऊन लोकसमुदायाला म्हणाला, काम
करण्याचे असे सहा दिवस आहेत; तर त्यांत येऊन
बरे होऊन जात जा, शब्बाथ दिवशीं येऊं नका; १५
परंतु प्रभूनें त्याला उत्तर दिलें, अहो ढोंग्यांनो, तुम्हां-
तील प्रत्येक जण आपला बैल किंवा गाढव शब्बाथ
दिवशीं ठाणावरून सोडून पाण्यावर नेतो कीं नाहीं ?
१६ ही तर अब्राहामाची कन्या आहे; पाहा, हिला
सैतानानें अठरा वर्षें बांधून ठेविलें होतें; हिला या
बंधनापासून शब्बाथ दिवशीं सोडविणें योग्य नव्हतें
काय ? १७ तो हें बोलत असतां त्याचे सर्व विरोधी
लज्जित झाले; आणि जीं गौरवयुक्त कृत्यें त्याजकडून
होत होतीं त्या सर्वांमुळें सर्व लोकसमुदायानें आनंद
केला.

### मोहरीच्या दाण्याचा व खमिराचा दृष्टांत

१८ ह्यावरून तो म्हणाला, देवाचें राज्य कशासारखें
आहे ? मी त्याला कशाची उपमा देऊं ? १९ तें मोह-
रीच्या दाण्यासारिखें आहे; तो एका मनुष्यानें घेऊन
आपल्या मळ्यांत पेरिला, मग तो वाढून झाड झालें;
आणि 'आकाशांतील पाखरें त्याच्या फांद्यांत वस्ती
राहूं लागलीं.'
२० तो पुनः म्हणाला, मी देवाच्या राज्याला कशाची
उपमा देऊं ? तें खमिरासारखें आहे; २१ तें स्त्रीनें
घेऊन तीन मापें पिठामध्यें लपवून ठेविलें, तेणेंकरून
शेवटीं तें सर्व फुगून गेलें.

### तारणप्राप्तीचें अरुंद प्रवेशद्वार

२२ तो शिक्षण देत नगरोनगरीं व गांवोगांवीं फिरत
फिरत यरुशलेमाकडे चालला. २३ तेव्हां कोणीएकानें
त्याला म्हटलें, प्रभुजी, तारणप्राप्ति होत असलेले लोक
थोडे आहेत कीं काय ? २४ तो त्यांस म्हणाला, अरुंद
दरवाजानें आंत जावयाला जोराचा यत्न करा; कारण
मी तुम्हांस सांगतों, पुष्कळ लोक आंत जावयास पाहतील,
परंतु त्यांच्यानें जाववणार नाहीं. २५ एकदां घरधन्यानें
उठून दार बंद केलें म्हणजे तुम्ही बाहेर उभे राहून व
दार ठोकून म्हणूं लागाल, प्रभुजी, आम्हांस उघडा; तेव्हां
तो तुम्हांस उत्तर देईल, तुम्ही कोठले आहां, हें मला
माहीत नाहीं; २६ तेव्हां तुम्ही म्हणूं लागाल, आम्हीं
तुमच्यासमक्ष खालेंप्यालें, आणि तुम्हीं आमच्या मार्गांवर
शिक्षण दिलें; २७ परंतु तो म्हणेल, मी तुम्हांस सांगतों,
तुम्ही कोठले आहां हें मला माहीत नाहीं; 'अहो सर्व
अधर्म करणाऱ्यांनो, तुम्ही मजपासून दूर व्हा.' २८ तुम्ही
जेव्हां अब्राहाम, इसहाक, याकोब व सर्व संदेष्टे यांस
देवाच्या राज्यांत असलेले व स्वतःस बाहेर टाकण्यांत
आलेले पाहाल, तेव्हां रडणें व दांतखाणें चालेल. २९
'पूर्वेकडून, पश्चिमेकडून,' उत्तरेकडून व दक्षिणेकडून लोक
येऊन देवाच्या राज्यांत बसतील; ३० आणि पाहा, जे
पहिले होतील असे कांहीं शेवटले आहेत, आणि शेवटले
होतील असे कांहीं पहिले आहेत.

### हेरोदाचें वैर

३१ त्याच घटकेस कित्येक परूशी येऊन त्याला
म्हणाले, इथून निघून जा; कारण हेरोद तुम्हांला जिवें
मारावयास पाहत आहे. ३२ त्यानें त्यांस म्हटलें, त्या
खोकडाला जाऊन सांगा, पाहा, मी आज व उद्यां भूतें

काढितों व रोग बरे करितों, आणि तिसऱ्या दिवशीं मी परिपूर्ण होईन. ३३ तरी मला आज, उद्यां व परवां पुढें चाललें पाहिजे; कारण यरुशलेमाबाहेर संदेष्ट्याचा नाश झाला असें व्हावयाचें नाहीं.

### यरुशलेमाची स्थिति पाहून केलेला विलाप

३४ यरुशलेमा, यरुशलेमा, संदेष्ट्यांचा घात करणाऱ्या, व तुझ्याकडे पाठविलेल्यांस दगडमार करणाऱ्या! जशी कोंबडी आपलीं पिलें पंखांखालीं एकवट करिते तसें तुझ्या मुलांबाळांस एकवट करावयाचें किती तरी वेळां माझ्या मनांत आलें; पण तें तुमच्या मनांत आलें नाहीं! ३५ पाहा, 'तुमचें घर तुम्हांकरितां ओसाड असें पडलें आहे;' मी तुम्हांस सांगतों कीं 'प्रभूच्या नामानें येणारा तो धन्यवादित' असें म्हणाल, तोंपर्यंत तुम्ही मला पाहणारच नाहीं.

### शब्बाथ दिवशीं जलोदऱ्याला बरें करणें

**१४** १ तो एका शब्बाथ दिवशीं परूश्यांतील कोणी-एका अधिकाऱ्याच्या घरीं भोजनास गेला, तेव्हां असें झालें कीं ते त्याच्या जपणीस बसले होते; २ आणि पाहा, तेथें त्याच्यासमोर जलोदर झालेला कोणी मनुष्य होता. ३ येशूनें शास्त्र्यांस व परूश्यांस विचारिलें, शब्बाथ दिवशीं रोग बरे करणें योग्य आहे किंवा नाहीं? ४ तेव्हां ते गप्प राहिले. मग त्यानें त्याला धरून बरें केलें व लावून दिलें. ५ मग त्यानें त्यांस म्हटलें, तुमच्यापैकीं कोणाचा मुलगा किंवा बैल विहिरींत पडला तर तो त्याला शब्बाथ दिवशीं तत्क्षणीं बाहेर काढणार नाहीं काय? ६ तेव्हां त्यांच्यानें त्याला त्या प्रश्नाचें उत्तर देववेना.

### नम्रता व आतिथ्यशीलता

७ तेव्हां आमंत्रित लोक मुख्यमुख्य आसनें कशीं निवडून घेत होते हें पाहून तो त्यांस दाखला देऊन म्हणाला: ८ कोणी तुला लग्नाच्या मेजवानीचें आमंत्रण केलें तर मुख्य आसनीं बसूं नको; कदाचित् तुजहून मोठ्या योग्यतेच्या कोणाला त्यानें आमंत्रण केलें असेल; ९ मग ज्यानें तुला व त्याला आमंत्रण केलें तो येऊन तुला म्हणेल, याला जागा दे; तेव्हां तूं लाजेनें अगदीं खालच्या जागेवर जाऊन बसशील. १० तुला आमंत्रण असल्यास अगदीं खालच्या जागेवर जाऊन बैस; म्हणजे ज्यानें तुला आमंत्रण केलें तो येईल तेव्हां तुला म्हणेल, मित्रा, वर येऊन बैस; म्हणजे तुझ्याबरोबर भोजनास बसलेल्या सर्वांसमोर तुझा मान होईल. ११ कारण जो कोणी आपणाला उंच करितो तो नीच केला जाईल; व जो आपणाला नीच करितो तो उंच केला जाईल.

१२ मग ज्यानें त्याला आमंत्रण केलें होतें त्यालाहि तो म्हणाला, जेव्हां दुपारची किंवा संध्याकाळची जेवणावळ करिशील तेव्हां तूं आपले मित्र, आपले भाऊ, आपले नातलग किंवा धनवान् शेजारी यांस बोलावूं नको; बोलाविल्यास कदाचित् तेहि तुला उलट आमंत्रण करतील, व तुझी फेड होईल. १३ तर तूं मेजवानी करिशील तेव्हां दरिद्री, व्यंग, लंगडे व अंधळे यांस आमंत्रण कर; १४ म्हणजे तूं धन्य होशील. तुझी फेड करावयास त्यांजवळ कांहीं नाहीं; तरी धार्मिकांच्या पुनरुत्थानसमयीं तुझी फेड होईल.

### लग्नाच्या जेवणावळीचा दृष्टांत

१५ मग त्याजबरोबर भोजनास बसलेल्यांपैकीं कोणाएकानें या गोष्टी ऐकून त्याला म्हटलें, जो देवाच्या राज्यांत अन्न खाईल तो धन्य. १६ त्यानें त्याला म्हटलें, कोणाएका मनुष्यानें संध्याकाळची मोठी जेवणावळ केली, तेव्हां बहुतांस आमंत्रण केलें; १७ आणि जेवणाच्या वेळेस, आतां या, तयारी झाली आहे, असें आमंत्रितांस सांगावयाला त्यानें आपल्या एका दासास पाठविलें. १८ तेव्हां ते सर्व जण सारखेच निमित्त सांगूं लागले. पहिला त्याला म्हणाला, मीं शेत विकत घेतलें आहे, तें मला जाऊन पाहिलें पाहिजे; मी तुला विनंति करितों, मला क्षमा असावी. १९ दुसरा म्हणाला, मीं बैलांच्या पांच जोड्या विकत घेतल्या आहेत, त्या मी तपासावयाला जातों; मी तुला विनंति करितों, मला क्षमा असावी. २० आणखी एक जण म्हणाला, मीं बायको केली आहे, म्हणून माझें येणें होत नाहीं. २१ मग त्या दासानें येऊन आपल्या धन्याला हें वर्तमान सांगितलें. तेव्हां घरधनी रागावून आपल्या दासाला म्हणाला, नगराच्या रस्त्यांत व गल्ल्यांत लवकर जा, आणि दरिद्री, व्यंग, अंधळे व लंगडे यांस इकडे आण. २२ दास म्हणाला, महाराज, आपण आज्ञा केल्याप्रमाणें झालें आहे, तरी अद्यापि

जागा आहे. २३ धनी दासास म्हणाला, माझें घर भरून जावें म्हणून सडकांवर व कुंपणाकडे जाऊन लोकांस आग्रह करून आण; २४ कारण मी तुम्हांस सांगतों कीं त्या आमंत्रित मनुष्यांतून एकहि माझ्या जेवणांतलें कांहीं चाखणार नाहीं.

## खरे शिष्य कोण ?

२५ त्याच्याबरोबर मोठे लोकसमुदाय चालले होते; तेव्हां तो त्यांजकडे वळून म्हणाला, २६ जर कोणी मजकडे येतो आणि आपला बाप, आई, बायको, मुलें, भाऊ व बहिणी यांचा आणि आपल्या जीवाचाहि द्वेष करीत नाहीं तर त्याला माझा शिष्य होतां येत नाहीं. २७ जो कोणी आपला वधस्तंभ घेऊन माझ्यामागें येत नाहीं त्याला माझा शिष्य होतां येत नाहीं. २८ बुरूज बांधावयाची इच्छा असतां पहिल्यानें बसून व खर्चाचा अंदाज करून आपल्याजवळ तो पुरा करण्याइतकी ऐपत आहे कीं काय हें पाहत नाहीं असा तुम्हांत कोण आहे ? २९ नाहीं तर कदाचित् पाया घातल्यावर त्याच्यानें तो जर पुरा करवला नाहीं, तर सर्व पाहणारे लोक त्याचा उपहास करून म्हणतील, ३० हा मनुष्य बांधूं लागला परंतु ह्याच्यानें तो पुरा करवला नाहीं; ३१ अथवा असा राजा कोण आहे कीं तो दुसऱ्या राजाबरोबर लढाईंत सामना करण्यास निघाला असतां पहिल्यानें बसून विचार करीत नाहीं कीं जो वीस हजार घेऊन मजवर येतो त्याजवर माझ्यानें दहा हजारांनिशीं जाववेल काय ? ३२ जर नाहीं, तर तो दूर आहे तोंच वकिलांस पाठवून सलूयाचें बोलणें लावितो. ३३ तर त्याप्रमाणें तुम्हांतील जो आपल्या सर्वस्वाचा परित्याग करीत नाहीं त्याला माझा शिष्य होतां येत नाहीं. ३४ मीठ हा चांगला पदार्थ आहे; पण मिठाचा खारटपणाच गेला तर त्याला रुचि कशानें येईल ? ३५ तें जमिनीला किंवा खताला उपयोगी नाहीं; तें टाकून देतात. ज्याला ऐकावयास कान आहेत तो ऐको.

## हरवलेलें मेंढरूं

१ सर्व जकातदार व पापी लोक त्याचें ऐका-
१५ वयास त्याच्याजवळ येत होते. २ तेव्हां परूशी
व शास्त्री या उभयतांनीं अशी कुरकूर केली कीं
हा पापी लोकांचा स्वीकार करून त्यांजबरोबर जेवतो.

३ मग त्यानें त्यांस हा दाखला सांगितला : ४ तुम्हांमध्यें असा कोण मनुष्य आहे कीं त्याच्याजवळ शंभर मेंढरें असतां त्यांतून एक हरवलें, तर तीं नव्याण्णव रानांत सोडून देऊन हरवलेलें सांपडेपर्यंत त्याचा शोध करीत नाहीं ? ५ तें सांपडल्यावर तो तें आनंदानें खांद्यावर घेतो; ६ आणि घरीं येऊन मित्रांस व शेजाऱ्यांस बोलावून त्यांस म्हणतो, माझें हरवलेलें मेंढरूं सांपडलें आहे म्हणून माझ्याबरोबर आनंद करा. ७ त्याप्रमाणें ज्यांस पश्चात्तापाची गरज नाहीं अशा नव्याण्णव धार्मिकांबद्दल होणाऱ्या आनंदापेक्षां पश्चात्ताप करणाऱ्या एका पापी मनुष्याबद्दल स्वर्गांत अधिक आनंद होईल, हें मी तुम्हांस सांगतों.

## हरवलेलें नाणें

८ तसेंच, अशी स्त्री कोण आहे कीं तिच्याजवळ दहा पावल्या असतां त्यांतून एक पावली हरवली तर दिवा लावून व घर झाडून ती सांपडेपर्यंत मन लावून शोध करीत राहत नाहीं ? ९ ती सांपडल्यावर ती मैत्रिणींस व शेजाऱ्यांस बोलावून म्हणते, माझी हरवलेली पावली मला सांपडली, म्हणून माझ्याबरोबर आनंद करा. १० त्याप्रमाणें, पश्चात्ताप करणाऱ्या एका पापी मनुष्याबद्दल देवाच्या दूतांसमोर आनंद होतो, हें मी तुम्हांस सांगतों.

## उधळ्या पुत्र

११ आणखी तो म्हणाला, कोणाएका मनुष्याला दोन मुलगे होते; १२ त्यांतील धाकटा बापाला म्हणाला, बाबा, मालमत्तेचा माझा वांटा मला द्या. तेव्हां त्यानें त्यांस आपली संपत्ति वांटून दिली. १३ मग फार दिवस झाले नाहींत तों धाकटा मुलगा सर्व जमा करून दूर देशीं गेला; आणि तेथें त्यानें चैनबाजी करून आपली संपत्ति उडविली. १४ त्यानें आपलें सर्व खर्चून टाकिल्यावर त्या देशांत मोठा दुष्काळ पडला; तेव्हां त्याला अडचण पडूं लागली. १५ मग तो त्या देशांतील एका रहिवाश्याजवळ जाऊन त्याला चिकटून राहिला; त्यानें त्याला आपल्या शेतांत डुकरें चारावयास पाठविलें. १६ तेव्हां ज्या शेंगा डुकरें खात असत त्यांतल्या तरी खाऊन पोट भरावें असें त्याला वाटलें; त्याला कोणीं

कांहीं दिलें नाहीं. १७ नंतर तो शुद्धीवर येऊन
म्हणाला, माझ्या बापाच्या किती मोलकऱ्यांस भाक-
रीची रेलचेल आहे! आणि मी एथें भुकेनें मरतों.
१८ मी उठून आपल्या बापाकडे जाईन व त्याला
म्हणेन, बाबा, मीं स्वर्गाविरुद्ध व तुमच्या दृष्टीनें पाप
केलें आहे; १९ आतां तुमचा पुत्र म्हणवावयास
मी योग्य नाहीं; आपल्या एका मोलकऱ्याप्रमाणें मला
ठेवा. २० मग तो उठून आपल्या बापाकडे गेला.
तो दूर आहे इतक्यांत त्याच्या बापानें त्याला पाहिलें
आणि कळवळा येऊन तो धावत गेला; त्यानें त्याच्या
गळ्यांत मिठी घातली व त्याचे पुष्कळ मुके घेतले.
२१ मुलगा त्याला म्हणाला, बाबा, मीं स्वर्गाविरुद्ध व
तुमच्या दृष्टीनें पाप केलें आहे; आणि आतां तुमचा
पुत्र म्हणवावयास मी योग्य नाहीं; २२ पण बापानें
आपल्या दासांस सांगितलें, लवकर उत्तम झगा आणून
याला घाला; आणि याच्या हातांत अंगठी व पायांत
जोडा घाला; २३ पोसलेलें वासरूं आणून कापा;
आपण खाऊं आणि उत्साह करूं; २४ कारण हा
माझा मुलगा मेला होता तो पुनः जीवंत झाला
आहे; हरवला होता तो सांपडला आहे; मग ते
उत्साह करूं लागले. २५ त्याचा वडील मुलगा शेतांत
होता; तो घराजवळ आला तेव्हां त्यानें वाद्यें व
नृत्य ऐकलें. २६ तेव्हां त्यानें एका चाकराला बोला-
वून विचारिलें, हें काय चाललें आहे? २७ त्यानें
त्याला सांगितलें, आपला भाऊ आला आहे; आणि
तो आपल्या वडिलांना सुखरूप मिळाला म्हणून त्यांनीं
पोसलेलें वासरूं कापिलें आहे. २८ तेव्हां तो रागावून
आंत जाईना, म्हणून त्याचा बाप बाहेर येऊन त्याची
समजूत घालूं लागला; २९ परंतु त्यानें बापाला
उत्तर दिलें, पाहा, मी इतकीं वर्षे तुमची सेवाचाकरी
करीत आहें, आणि तुमची एकहि आज्ञा मीं कधीं
मोडिली नाहीं; तरी मीं आपल्या मित्रांबरोबर उत्साह
करावा, म्हणून तुम्हीं मला कधीं करडूंहि दिलें नाहीं;
३० पण ज्यानें तुमची संपत्ति कसबिणींबरोबर खाऊन
टाकिली तो हा तुमचा मुलगा आला तेव्हां तुम्हीं
त्याच्यासाठीं पोसलेलें वासरूं कापिलें. ३१ त्यानें
त्याला म्हटलें, बाळा, तूं माझ्याबरोबर नेहमींच आहेस,
आणि जें कांहीं माझें आहे तें सर्व तुझेंच आहे; ३२ तरी
उत्साह व आनंद करणें हें योग्य आहे; कारण हा
तुझा भाऊ मेला होता, तो जिवंत झाला आहे; हरवला
होता तो सांपडला आहे.

### अन्यायी कारभारी

१ त्यानें शिष्यांसहि म्हटलें, कोणीएक
१६ श्रीमंत मनुष्य होता व त्याचा एक कारभारी
होता; त्याजवर, हा तुमचें द्रव्य उडवितो,
असा आरोप त्याकडे करण्यांत आला. २ तेव्हां त्यानें
त्याला बोलावून म्हटलें, तुजविषयीं मी हें काय ऐकतों? तूं
आपल्या कारभाराचा हिशोब दे; कारण यापुढें तुला
कारभार पाहावयाचा नाहीं. ३ मग कारभाऱ्यानें आपल्या
मनांत म्हटलें, माझा धनी मजपासून कारभार काढून
घेणार आहे, तर मी काय करूं? खणावयास मला शक्ति
नाहीं; भीक मागावयास लाज वाटते. ४ तर कारभारावरून
काढिल्यावर लोकांनीं मला आपल्या घरांत घ्यावें म्हणून मीं
काय करावें हें आतां मला सुचलें. ५ मग त्यानें आपल्या
धन्याच्या प्रत्येक देणेकऱ्यास बोलाविलें आणि पहिल्याला
म्हटलें, माझ्या धन्याचें तुला किती देणें आहे? ६ तो
म्हणाला, शंभर मण तेल. त्यानें त्याला म्हटलें, हा तुझा
लेख घे आणि लवकर बसून यावर पन्नास मांड. ७ नंतर
दुसऱ्याला म्हटलें, तुला किती देणें आहे? तो म्हणाला,
शंभर खंड्या गहूं. तो त्याला म्हणाला, हा तुझा लेख घे व
ऐशीं मांड. ८ अन्यायी कारभाऱ्यानें शहाणपण केलें
यावरून धन्यानें त्याची वाहवा केली; या युगाचे पुत्र
स्वजातीविषयीं प्रकाशाच्या पुत्रांपेक्षां शहाणे असतात.

### संपत्तीचा सदुपयोग

९ आणखी मी तुम्हांस सांगतों, अन्यायाच्या धनानें
तुम्ही आपणांसाठीं मित्र जोडा; यासाठीं कीं तें नाहींसें होईल
तेव्हां त्यांनीं तुम्हांस चिरकाल टिकणाऱ्या वस्तींत घ्यावें. १०
जो अगदीं अल्प गोष्टीविषयीं विश्वासू तो पुष्कळाविषयींहि
विश्वासू आहे, आणि जो अगदीं अल्प गोष्टीविषयीं अन्यायी
तो पुष्कळाविषयींहि अन्यायी आहे. ११ वास्तव तुम्ही

अन्यायाच्या धनाविषयीं विश्वासू न झालां तर जें खरें धन
तें तुम्हांला कोण सोपून देईल ? १२ आणि जें दुसऱ्याचें
त्याविषयीं तुम्ही विश्वासू न झालां तर जें तुमचें स्वतःचें
तें तुम्हांस कोण देईल ? १३ कोणत्याहि चाकराला दोन
धन्यांची चाकरी करितां येत नाहीं; कारण तो एकाचा द्वेष
करील व दुसऱ्यावर प्रीति करील; अथवा एकाला धरून
राहील व दुसऱ्याला तुच्छ मानील. तुम्हांला देवाची आणि
धनाची सेवा करितां येत नाहीं.

### परूश्यांचा निषेध करण्यांत येतो

१४ हें सर्व ऐकून धनलोभी परूश्यांनीं त्याचा उपहास
केला. १५ त्यानें त्यांस म्हटलें, तुम्ही आपणांस मनुष्यां-
समक्ष धार्मिक ठरवून घेणारे आहां, परंतु देव तुमचीं
अंतःकरणें ओळखून घेतो; मनुष्यांस जें उच्च असें वाटतें
तें देवाच्या दृष्टीनें ओंगळ आहे. १६ योहानापर्यंत नियम-
शास्त्र व संदेष्टे होते; तेव्हांपासून देवाच्या राज्याची
सुवार्ता गाजविली जात आहे, आणि प्रत्येक मनुष्य त्यांत
नेटानें प्रवेश करितो. १७ नियमशास्त्राचा एक फाटा रद्द
होण्यापेक्षां आकाश व पृथ्वी नाहींशी होणें हें सोपें आहे.
१८ जो कोणी आपली बायको टाकून दुसरीबरोबर
लग्न करितो तो व्यभिचार करितो; आणि नवऱ्यानें
टाकिलेल्या बायकोबरोबर जो लग्न करितो तो व्यभिचार
करितो.

### श्रीमंत माणूस व भिकारी लाजार

१९ कोणीएक श्रीमंत मनुष्य होता, तो जांभळीं व
फार बारीक सुताचीं वस्त्रें घालीत असे, आणि प्रतिदिवशीं
थाटामाटानें ख्यालीखुशाली करीत असे; २० त्याच्या
दरवाजाजवळ लाजार नांवाचा फोडांनीं भरलेला एक दरिद्री
टाकण्यांत आला होता; २१ त्या श्रीमंताच्या मेजा-
वरून खालीं पडेल त्यावर आपलें पोट भरावें अशी
त्याची इच्छा होती; आणि कुत्रीं येऊन त्याचे फोड
चाटीत असत. २२ पुढें असें झालें कीं तो दरिद्री
मेला, आणि देवदूतांनीं त्याला अब्राहामाच्या उराजवळ
नेऊन ठेविलें; श्रीमंतहि मेला व त्याला पुरलें. २३
मग तो अधोलोकांत यातना भोगीत असतां त्यानें
आपली दृष्टि वर करून अब्राहाम व त्याच्या उरा-
जवळ असलेला लाजार यांस दुरून पाहिलें. २४
तेव्हां त्यानें हाक मारून म्हटलें, हे बापा अब्रा-
हामा, मजवर दया करून लाजाराला पाठीव, यासाठीं
कीं त्यानें आपल्या बोटाचें टोक पाण्यांत बुचकळून
माझी जीभ थंड करावी; कारण या जाळांत मी
क्लेश भोगीत आहें. २५ अब्राहाम म्हणाला, मुला,
तुला आपल्या आयुष्यांत आपलें सुख भरून मिळालें, तसें
लाजाराला दुःख भरून मिळालें, याची आठवण कर; आतां
त्याला एथें समाधान मिळत आहे व तूं क्लेश भोगीत
आहेस; २६ याशिवाय जे एथून तुम्हांकडे पार जाऊं
पाहतात त्यांस जातां येऊं नये व तिकडून कोणीं
आम्हांकडे येऊं नये म्हणून आमच्या व तुमच्यामध्यें
मोठा दरा स्थापिलेला आहे. २७ मग तो म्हणाला,
तर बापा, मी विनंति करितों, त्याला माझ्या बापाच्या
घरीं पाठीव; २८ कारण मला पांच बंधु आहेत;
त्यांनीं तरी या यातनेच्या स्थळीं येऊं नये म्हणून
त्यानें त्यांस साक्ष द्यावी. २९ अब्राहामानें त्याला
म्हटलें, त्यांच्याजवळ मोशे व संदेष्टे आहेत त्यांचें
त्यांनीं ऐकावें. ३० तो म्हणाला, हे बापा अब्राहामा,
असें नाहीं; मेलेल्यांमधून कोणी त्यांजकडे गेला तर
ते पश्चात्ताप करितील. ३१ तेव्हां त्यानें त्याला म्हटलें,
जर ते मोशाचें व संदेष्ट्यांचें ऐकत नाहींत तर
मेलेल्यांमधूनहि कोणी उठला तरी त्यांची खातरी
होणार नाहीं.

### येशूचीं कांहीं वचनें

१ मग त्यानें शिष्यांस म्हटलें, अडखळ-
१७ ण्याचीं कारणें न व्हावीं हें अशक्य आहे;
परंतु ज्यापासून तीं उद्भवतात त्याला धिक्कार
असो ! २ त्यानें या लहानांतील एकाला अडखळ-
वावें यापेक्षां त्याच्या गळ्यांत जात्याची तळी बांधून
त्याला समुद्रांत टाकावें यांत त्याचें बरें आहे. ३
तुम्ही आपणांस संभाळा; तुझ्या भावानें अपराध
केला तर त्याचा निषेध कर; आणि त्यानें पश्चात्ताप
केला तर त्याला क्षमा कर. ४ त्यानें एका दिवसांत
सात वेळां तुझा अपराध केला, आणि सात वेळां

तुजकडे येऊन, मी पश्चात्ताप करितों, असें म्हटलें;
तर त्याला क्षमा कर.
५ मग प्रेषित प्रभूला म्हणाले, आमचा विश्वास
वाढवा. ६ प्रभु म्हणाला, तुम्हांमध्यें मोहरीच्या दाण्या-
एवढा विश्वास असला तर या तुतीला, तूं उपटून
समुद्रांत लाविली जा, असें तुम्हीं सांगितल्यास ती
तुमचें ऐकेल. ७ तुम्हांपैकीं असा कोण आहे कीं
त्याचा नांगरणारा किंवा मेंढरें राखणारा दास शेतांतून
आल्यावर तो त्याला म्हणेल, आतांच येऊन जेवाव-
याला बैस? ८ उलट तो त्याला असें म्हणणार नाहीं
काय कीं माझें जेवण तयार कर, माझें खाणेंपिणें
होईपर्यंत कमर बांधून माझी सेवा कर, आणि मग
तूं खा व पी? ९ सांगितलेलीं कामें दासानें केलीं
म्हणून तो त्याचे उपकार मानितो काय? १० तसेंच
तुम्हांस सांगितलेलीं सर्व कामें केल्यावर, आम्ही निरु-
पयोगी दास आहों, आमचें कर्तव्य तेंच आम्हीं केलें,
असें म्हणा.

## येशू दहा महारोग्यांना बरें करतो

११ ते यरुशलेमाकडे जात असतां असें झालें कीं
तो शोमरोन व गालील यांमधून चालला; १२ आणि
तो एका गांवांत जात असतां कुष्ठरोग असलेले दहा
पुरुष त्याला भेटले. १३ ते दूर उभे राहून उच्च
स्वरानें म्हणाले, अहो येशू, गुरुजी, आम्हांवर दया
करा. १४ त्यानें त्यांस पाहून म्हटलें, तुम्ही जाऊन
आपणांस 'याजकांला दाखवा.' मग असें झालें कीं ते
जातां जातां शुद्ध झाले. १५ त्यांतील एक जण
आपण बरे झालों आहों असें पाहून मोठ्यानें
देवाचा महिमा वर्णीत परत आला; १६ आणि त्याचे
आभार मानून त्याच्या चरणांजवळ उपडा पडला; हा तर
शोमरोनी होता. १७ तेव्हां येशूनें म्हटलें, कीं एकंदर
दहा जण शुद्ध झाले नव्हते का? तर त्यांतील नऊ कोठें
आहेत? १८ या परक्यावांचून देवाचें गौरव करावयास
परत आलेले असे कोणी आढळले नाहींत काय? १९
तेव्हां त्यानें त्याला म्हटलें, उठून जा, तुझ्या विश्वासानें
तुला बरें केलें आहे.

## स्वर्गाच्या राज्याचें आगमन

२० देवाचें राज्य केव्हां येईल असें परूश्यांनीं त्याला
विचारिलें असतां त्यानें त्यांस उत्तर दिलें, देवाचें राज्य
दृश्यरूपानें येत नाहीं; २१ पाहा, तें एथें आहे! किंवा
तेथें आहे! असें बोलणार नाहींत, कारण पाहा, देवाचें
राज्य तुम्हांमध्यें आहे.
२२ त्यावर त्यानें शिष्यांस म्हटलें, असे दिवस येतील
कीं त्यांत तुम्ही मनुष्याच्या पुत्राचा एक दिवस पाहण्याची
इच्छा कराल पण तो तुम्हांस दिसणार नाहीं. २३ ते
तुम्हांस म्हणतील, पाहा, तो तेथें आहे, पाहा, येथें आहे!
तर तुम्ही निघून जाऊं नका, व त्यांच्यामागें लागूं नका;
२४ कारण जशी वीज आकाशाखालच्या एका बाजूस
चमकून आकाशाखालच्या दुसऱ्या बाजूपर्यंत प्रकाशते,
तसेंच मनुष्याच्या पुत्राचेंहि त्याच्या दिवसांत होईल. २५
तथापि त्यानें प्रथम फार दुःख भोगावें व या पिढीच्या
हातून नाकारिलें जावें याचें अगत्य आहे. २६ नोहाच्या
दिवसांत झालें तसें मनुष्याच्या पुत्राच्या दिवसांतहि होईल.
२७ 'नोहा नौकेंत गेला' त्या दिवसापर्यंत लोक खातपीत
होते, लग्न करून घेतदेत होते, इतक्यांत जलप्रलयानें
येऊन सर्वांचा नाश केला. २८ तसेंच ज्याप्रमाणें लोटाच्या
दिवसांत झालें, त्याप्रमाणें होईल; म्हणजे ते खातपीत,
विकत घेतदेत होते; लावणी करीत होते, घरें बांधीत
होते; २९ परंतु ज्या दिवशीं लोट सदोमांतून निघाला त्याच
दिवशीं 'आकाशांतून अग्नि व गंधक यांची वृष्टि होऊन'
सर्वांचा नाश झाला. ३० मनुष्याचा पुत्र प्रगट होईल
त्या दिवशीं त्याप्रमाणें होईल. ३१ त्या दिवशीं जो धाब्या-
वर असेल त्यानें घरांत असलेलें आपलें सामान नेण्या-
करितां खालीं येऊं नये; आणि तसेंच जो शेतांत असेल
'त्यानें मागें फिरूं' नये. ३२ लोटाच्या बायकोची आठवण
करा. ३३ जो कोणी आपला जीव आपणासाठीं राखाव-
याचा यत्न करील तो त्याला मुकेल, आणि जो कोणी
त्याला मुकेल तो त्याला वांचवील. ३४ मी तुम्हांस सांगतों,
त्या रात्रीं एका बाजेवर दोघे असतील, एकाला घेतलें
जाईल व दुसऱ्याला ठेविलें जाईल. ३५ दोघी एकत्र
दळीत असतील; एकीला घेतलें जाईल व दुसरीला ठेविलें

जाईल. ३६ [ शेतांत दोघे असतील, एकाला घेतलें जाईल व दुसऱ्याला ठेविलें जाईल. ] ३७ त्यांनीं त्याला म्हटलें, प्रभुजी, कोठें? त्यानें त्यांस म्हटलें, जेथें प्रेत आहे तेथें गीध जमतील.

## अनीतिमान् न्यायाधीश

१ त्यांनीं सर्वदा प्रार्थना करावी व थकूं नये,
१८ याविषयीं त्यानें त्यांस एक दाखला सांगितला, तो
असा: २ कोणाएका नगरांत एक न्यायाधीश
होता, तो देवाचें भय धरीत नसे व मनुष्याची पर्वा करीत
नसे; ३ आणि त्याच नगरांत एक विधवा होती, ती त्याजकडे
वारंवार येऊन म्हणत असे कीं माझा न्याय करून मला
आपल्या प्रतिवाद्यापासून सोडवा. ४ तरी बराच काळपर्यंत
तो तें करीना; परंतु शेवटीं त्यानें आपल्या मनांत म्हटलें,
जरी मी देवाचें भय धरीत नाहीं व मनुष्याची पर्वा करीत
नाहीं, ५ तरी ही विधवा मला त्रास देते म्हणूनच मी
तिचा न्याय करीन, नाहींतर ती नेहमीं नेहमीं येऊन मला
अगदीं रंजीस करून टाकील. ६ तेव्हां प्रभूनें म्हटलें,
अन्यायी न्यायाधीश काय म्हणतो तें ऐका. ७ तर देवाचे
जे निवडिलेले रात्रंदिवस त्याला हाका मारितात त्यांचा तो
न्याय करणार नाहीं काय? आणि त्यांजविषयीं तो विलंब
लावील काय? ८ मी तुम्हांस सांगतों, तो त्यांचा न्याय
लवकर करील; तरी मनुष्याचा पुत्र येईल तेव्हां त्याला
पृथ्वीवर विश्वास सांपडेल काय?

## परूशी व जकातदार

९ आपण धार्मिक आहों असा जे कित्येक स्वत:विषयीं
भरवसा धरून इतर सर्वांस तुच्छ मानीत होते त्यांसहि
त्यानें हा दाखला सांगितला: १० एक परूशी व एक
जकातदार असे दोघे जण प्रार्थना करावयास मंदिरांत वर
गेले; ११ परूश्यानें उभें राहून आपल्या मनांत अशी
प्रार्थना केली: हे देवा, इतर मनुष्यें अपहारी, अधर्मी,
व्यभिचारी अशीं आहेत, त्यांसारिखा किंवा या जकात-
दारासारिखाहि मी नाहीं, म्हणून मी तुझे आभार मानितों.
१२ मी आठवड्यांतून दोनदा उपास करितों; जें मला
मिळतें त्या सर्वांचा दशांश देतों. १३ जकातदार तर दूर
उभा राहून वर स्वर्गाकडे दृष्टि लावावयासहि न धजतां
आपल्या उरावर मारून घेऊन म्हणाला, हे देवा, मज पापी
मनुष्यावर दया कर. १४ मी तुम्हांस सांगतों, हा त्या
दुसऱ्यापेक्षां निर्दोषी ठरून खालीं आपल्या घरीं गेला;
कारण जो कोणी आपणाला उंच करितो तो नीच केला जाईल;
आणि जो आपणाला नीच करितो तो उंच केला जाईल.

## येशू लहान मुलांना आशीर्वाद देतो

१५ नंतर लोकांनीं आपलीं तान्हीं बाळकेंहि त्यानें त्यांस
स्पर्श करावा म्हणून त्याजकडे आणिलीं; परंतु शिष्यांनीं हें
पाहून त्यांस दटाविलें. १६ येशूनें तर बाळकांस आपणा-
जवळ बोलाविलें आणि म्हटलें, बाळकांस मजजवळ येऊं
द्या, त्यांस मना करूं नका; कारण देवाचें राज्य असल्यांचेंच
आहे. १७ मी तुम्हांस खचीत सांगतों, जो कोणी बाळका-
सारिखा होऊन देवाचें राज्य स्वीकारणार नाहीं त्याचा त्यांत
प्रवेश होणारच नाहीं.

## शाश्वत जीवन व द्रव्याची आडकाठी

१८ कोणाएका अधिकाऱ्यानें त्याला विचारलें, अहो
उत्तम गुरुजी, मीं काय केलें असतां मला सार्वकालिक
जीवन हें वतन मिळेल? १९ येशू त्याला म्हणाला, मला
उत्तम कां म्हणतोस? एक म्हणजे देव त्यावांचून कोणी
उत्तम नाहीं. २० तुला आज्ञा ठाऊक आहेत; 'व्यभिचार
करूं नको, मनुष्यहत्या करूं नको, चोरी करूं नको, खोटी
साक्ष देऊं नको, आपल्या बापाचा व आईचा सन्मान कर.
२१ तो म्हणाला, मी आपल्या बाळपणापासून या सर्व
पाळीत आलों आहें. २२ हें ऐकून येशूनें त्याला म्हटलें,
अद्यापि तुझ्यांत एक गोष्ट उणी आहे; तुझें जें कांहीं आहे
तें विकून दरिद्र्यांस वांटून दे, म्हणजे तुला स्वर्गांत संपत्ति
मिळेल; चल, माझ्या मागें ये. २३ हें ऐकून तो अति
दु:खित झाला, कारण तो फार श्रीमंत होता. २४ त्याला
पाहून येशू म्हणाला, ज्यांच्याजवळ धन आहे त्यांचा
देवाच्या राज्यांत प्रवेश होणें किती कठीण आहे! २५
श्रीमंतानें देवाच्या राज्यांत प्रवेश करणें यापेक्षां उंटानें
सुईच्या नेढ्यांतून जाणें सोपें आहे. २६ ज्यांनीं हें ऐकलें
ते म्हणाले, तर मग कोणाचें तारण होणें शक्य
आहे? २७ तो म्हणाला, ज्या गोष्टी मनुष्याला अशक्य
त्या देवाला शक्य आहेत. २८ तेव्हां पेत्र म्हणाला, पाहा,

आम्ही आपलें घरदार सोडून आपल्याला अनुसरलों आहों. २९ त्यानें त्यांस म्हटलें, मी तुम्हांस खचीत सांगतों, देवाच्या राज्याकरितां ज्यानें घर, बायको, भाऊ, आईबाप किंवा मुलेंबाळें सोडिलीं आहेत, ३० त्याला ह्या काळीं पुष्कळपट व पुढल्या युगांत सार्वकालिक जीवन मिळणार नाहीं असा कोणी नाहीं.

### येशू तिसऱ्या वेळीं आपल्या मृत्यूचें भविष्य सांगतो

३१ तेव्हां त्यानें बारा जणांस जवळ घेऊन त्यांस म्हटलें, पाहा, आपण यरुशलेमास वर चाललों आहों, आणि मनुष्याच्या पुत्राविषयीं ज्या गोष्टी संदेष्ट्यांच्या द्वारें लिहिण्यांत आल्या आहेत त्या सर्व पूर्ण होतील; ३२ म्हणजे त्याला विदेश्यांच्या स्वाधीन करण्यांत येईल, त्याची थट्टा व विटंबना होईल, त्याजवर थुंकतील; ३३ त्याला फटके मारितील, त्याचा जीव घेतील, आणि तो तिसऱ्या दिवशीं पुनः उठेल. ३४ त्यांस ह्या गोष्टींपैकीं कांहींच कळलें नाहीं; हें वचन त्यांच्यापासून गुप्त ठेवण्यांत आलें, आणि सांगितलेल्या गोष्टी त्यांच्या लक्षांत आल्या नाहींत.

### येशू अंधळ्याला बरें करतो

३५ तो यरीहोजवळ आला तेव्हां असें झालें कीं एक अंधळा वाटेवर भीक मागत बसला होता; ३६ त्यानें जवळून जाणाऱ्या लोकसमुदायाचा आवाज ऐकून विचारिलें, हें काय आहे? ३७ त्यांनीं त्याला सांगितलें, येशू नासरेथकर जवळून जात आहे. ३८ तेव्हां तो ओरडून म्हणाला, अहो येशू, दाविदाचे पुत्र, मजवर दया करा. ३९ तेव्हां त्यानें उगें राहावें म्हणून पुढें चालणाऱ्यांनीं त्याला दटाविलें, तरी तो अधिकच ओरडून म्हणाला, अहो दाविदाचे पुत्र, मजवर दया करा. ४० येशूनें उभें राहून त्याला आपणाकडे आणण्यास आज्ञा केली. तो जवळ आल्यावर त्यानें त्याला विचारिलें, ४१ मीं तुजसाठीं काय करावें म्हणून तुझें मागणें आहे? तो म्हणाला, प्रभुजी, मला दृष्टि यावी. ४२ येशू त्याला म्हणाला, तुला दृष्टि येवो; तुझ्या विश्वासानें तुला बरें केलें आहे. ४३ तत्क्षणीं त्याला दृष्टि आली आणि तो देवाचा महिमा वर्णीत त्याच्यामागें चालला; तेव्हां सर्व लोकांनीं हें पाहून देवाचें स्तवन केलें.

### जक्कय

**१९** १ तो यरीहोंत प्रवेश करून त्यांतून जात होता, २ तेव्हां पाहा, जक्कय नांवाचा कोणीएक मनुष्य होता; तो मुख्य जकातदार असून श्रीमंत होता. ३ त्यानें येशू कोणता आहे हें पाहण्याचा यत्न केला पण गर्दीमुळें त्याचें कांहीं चालेना, कारण तो ठेंगणा होता. ४ तेव्हां तो पुढें धावत जाऊन त्याला पाहण्यास उंबराच्या झाडावर चढला; कारण त्याला त्या वाटेनें जावयाचें होतें. ५ मग येशू त्या ठिकाणीं येतांच दृष्टि वर करून त्याला म्हणाला, जक्कया, त्वरा करून खालीं उतर; कारण आज मला तुझ्या घरीं उतरावयाचें आहे. ६ तेव्हां त्यानें त्वरेनें खालीं उतरून आनंदानें त्याचें आगतस्वागत केलें. ७ हें पाहून सर्व लोक, हा पापी मनुष्याच्या एथें उतरावयास गेला आहे, अशी कुरकुर करूं लागले. ८ तेव्हां जक्कय उभा राहून प्रभूला म्हणाला, प्रभुजी, पाहा, मी आपलें अर्धें द्रव्य दरिद्र्यांस देतों; आणि कुभांडानें कोणाचें कांहीं घेतलें असेल तें चौपट परत देतों. ९ येशूनें त्याला म्हटलें, आज या घराला तारण प्राप्त झालें आहे, कारण हाहि अब्राहामाचा पुत्र आहे. १० मनुष्याचा पुत्र 'हरवलेलें शोधावयास' व तारावयास आला आहे.

### मोहरांचा दृष्टांत

११ ते या गोष्टी ऐकत असतां त्यानें त्यांस एक दाखलाहि सांगितला; कारण तो यरुशलेमाजवळ होता, आणि देवाचें राज्य एव्हांच प्रगट होणार आहे असें त्यांस वाटत होतें. १२ तो म्हणाला, कोणीएक उमराव, आपण राज्य मिळवून परत यावें म्हणून, दूर देशीं गेला. १३ त्यानें आपल्या दहा दासांस बोलावून त्यांस दहा मोहरा दिल्या व त्यांस सांगितलें, मी येई तोंपर्यंत यांवर व्यापार करा. १४ त्याच्या नगरचे लोक त्याचा द्वेष करीत; त्यांनीं त्याच्यामागें वकील पाठवून सांगितलें, ह्यानें आम्हांवर राज्य करावें अशी आमची इच्छा नाहीं. १५ मग असें झालें कीं तो राज्य मिळवून परत आल्यावर ज्या दासांस पैका दिला होता त्यांनीं कायकाय व्यापार केला हें पाहावें म्हणून त्यानें त्यांस आपणाकडे बोलावावयास सांगितलें. १६ मग पहिला त्याजसमोर येऊन म्हणाला, महाराज, आपल्या मोहरेच्या

आपल्या दहा मोहरा झाल्या आहेत. १७ त्यानें त्याला
म्हटलें, शाबास, भल्या दासा; तूं अगदीं अल्प गोष्टीविषयीं
विश्वासू झालास, यास्तव दहा नगरांचा अधिकारी हो. १८
नंतर दुसरा येऊन म्हणाला, महाराज, आपल्या मोहरेच्या
पांच मोहरा झाल्या आहेत. १९ त्यालाहि त्यानें म्हटलें,
तूंहि पांच नगरांचा अधिकारी हो. २० मग आणखी एक
येऊन म्हणाला, महाराज, ही पाहा आपली मोहर, मीं
रुमालांत बांधून ठेवली होती. २१ आपण करडे मनुष्य
असल्यामुळें मला आपली भीति वाटली; जें आपण ठेविलें
नाहीं तें उचलून नेतां व जें आपण पेरिलें नाहीं तें कापितां.
२२ तो त्याला म्हणाला, अरे दुष्ट दासा, मीं तुझ्याच
तोंडानें तुझा न्यायनिवाडा करितों. मी करडा माणूस आहें,
जें मीं ठेविलें नाहीं तें उचलून नेतों, व जें मीं पेरिलें नाहीं
तें कापितों, हें तुला ठाऊक होतें; २३ तर तूं माझा पैका
पेढीवर कां ठेविला नाहीं? ठेविला असता तर तो मीं
येऊन व्याजासह उगविला असता. २४ मग त्यानें जवळ
उभें राहणाऱ्यांस सांगितलें, याजपासून मोहर घ्या व
ज्याच्याजवळ दहा मोहरा आहेत त्याला द्या. २५ ते त्याला
म्हणाले, महाराज, त्याच्याजवळ दहा मोहरा आहेत. २६
मी तुम्हांस सांगतों, ज्या कोणाजवळ आहे त्याला दिलें
जाईल; आणि ज्याच्याजवळ नाहीं त्याचें जें आहे तें
देखील त्याजपासून घेतलें जाईल. २७ आतां ज्या माझ्या
वैऱ्यांच्या मनांत मीं त्यांजवर राज्य करूं नये असें होतें
त्यांस एथें आणा, व माझ्यासमोर मारून टाका.

### येशूचा यरुशलेमांत जयोत्सवानें प्रवेश

२८ या गोष्टी सांगून तो यरुशलेमाकडे वर जात अस-
तांना स्वतः पुढें चालत होता.

२९ नंतर असें झालें कीं तो, जैतुनांचा डोंगर ह्या
नांवाच्या डोंगराजवळ असलेल्या बेथफगे व बेथानी
यांच्याजवळ येऊन पोहंचल्यावर त्यानें शिष्यांतून दोघांना
असें सांगून पाठविलें, ३० तुम्ही समोरच्या गांवांत जा;
म्हणजे त्यांत जातांच ज्याच्यावर कोणी कधीं बसलें नाहीं
असें एक शिंगरूं बांधलेलें तुम्हांस आढळेल; तें सोडून
आणा. ३१ तुम्ही तें कां सोडितां असें कोणीं तुम्हांस
विचारिलें तर, प्रभूला त्याची गरज आहे, असें सांगा. ३२
तेव्हां ज्यांना पाठविलें होतें ते तेथें गेल्यावर त्यांस त्यानें
सांगितल्याप्रमाणें आढळलें. ३३ ते शिंगरूं सोडीत असतां
त्याचे धनी त्यांस म्हणाले, शिंगरूं कां सोडितां? ३४
तेव्हां ते म्हणाले, प्रभूला याची गरज आहे. ३५ मग
त्यांनीं तें येशूकडे आणिलें आणि आपलीं वस्त्रें शिंगरावर
टाकून त्यावर येशूला बसविलें; ३६ आणि तो पुढें चालला
तसतसें ते आपलीं वस्त्रें वाटेवर पसरीत गेले. ३७ तो
जैतून डोंगराच्या उतरणीवर पोहंचतांच सर्व शिष्यसमुदाय,
जीं महत्कृत्यें त्यांनीं पाहिलीं होतीं त्या सर्वांमुळें आनंद
करून उच्च स्वरानें देवाची स्तुति करूं लागले: ३८ ‘प्रभूच्या
नामानें येणारा’ राजा ‘धन्यवादित असो;’ स्वर्गांत शांति,
आणि ऊर्ध्वलोकीं गौरव. ३९ तेव्हां लोकसमुदायांतील
कित्येक परूश्यांनीं त्याला म्हटलें, गुरुजी, आपल्या शिष्यांस
दटावा. ४० त्यानें म्हटलें, मी तुम्हांस सांगतों, हे उगे
राहिल्यास धोंडे ओरडतील.

### यरुशलेमाकडे पाहून येशूनें केलेला विलाप

४१ मग तो नगराजवळ आल्यावर तें पाहून त्याकरितां
रडून म्हणाला, ४२ जर तूंहि या दिवशीं शांतीच्या गोष्टी
ओळखून घेतल्या असत्या तर किती बरें होतें! परंतु
आतां त्या तुझ्या दृष्टीपासून गुप्त केल्या आहेत. ४३ पुढें
असे दिवस तुला येतील कीं ज्यांत तुझे शत्रु तुझ्याभोंवतीं
मेढेकोट बांधून तुला वेढा देतील, तुला चहूंकडून कोंडि-
तील, ४४ तुला व तुझ्यांतील ‘तुझ्या मुलांबाळांना धुळीस
मिळवितील,’ आणि तुझ्यांत धोंड्यावर धोंडा राहूं देणार
नाहींत; कारण तुझा समाचार घेतल्याचा प्रसंग तूं ओळ-
खिला नाहीं.

### येशू मंदिराचें शुद्धीकरण करतो

४५ नंतर तो मंदिरांत गेला, व त्यांत जे विक्रीत होते
त्यांस बाहेर घालवूं लागला; ४६ आणि त्यांस म्हणाला,
‘माझें घर प्रार्थनेचें मंदिर होईल,’ असें लिहिलें आहे;
परंतु तुम्हीं तें ‘लुटारूंची गुहा’ केलें आहे.

४७ तो मंदिरांत प्रतिदिवशीं शिक्षण देत असे, तेव्हां
मुख्य याजक, शास्त्री व लोकांचे मुख्य हे त्याचा घात करा-
वयास पाहत असत; ४८ तरी काय करावें हें त्यांस सुचेना;
कारण सर्व लोक त्याचें आसक्तीनें श्रवण करीत असत.

### येशूच्या अधिकाराविषयीं संशय घेण्यांत येतो

२० १ त्या दिवसांत एकदां असें झालें कीं तो मंदिरांत लोकांस शिक्षण देत व सुवार्ता सांगत असतां मुख्य याजक व शास्त्री हे वडिलांसह त्याच्याजवळ येऊन त्याला म्हणाले, २ तुम्ही कोणत्या अधिकारानें हें करितां, आणि तुम्हांला हा अधिकार देणारा कोण आहे, हें आम्हांस सांगा. ३ तेव्हां त्यानें त्यांस उत्तर दिलें, मीहि तुम्हांस एक प्रश्न विचारितों; मला उत्तर द्या. ४ योहानाचा बाप्तिस्मा स्वर्गांतून होता किंवा मनुष्यांतून होता? ५ तेव्हां ते आपसांत विचार करूं लागले, स्वर्गांतून असें म्हणूं तर हा म्हणेल कीं तुम्हीं त्याजवर विश्वास कां ठेविला नाहीं? ६ आणि मनुष्यांतून असें म्हणूं तर सर्व लोक आपल्याला दगडमार करितील, कारण योहान संदेष्टा होता अशी त्यांची खात्री आहे. ७ तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें, तो कोठून आहे हें आम्हांस ठाऊक नाहीं. ८ येशूनें त्यांस म्हटलें, तर कोणत्या अधिकारानें हें मी करितों तें मीहि तुम्हांस सांगत नाहीं.

### द्राक्षमळ्याचा दृष्टांत

९ मग तो लोकांस हा दाखला सांगूं लागला: कोणी-एका मनुष्यानें 'द्राक्षमळा लाविला' आणि तो माळ्यांस सोपून देऊन आपण बरेच दिवस परदेशांत जाऊन राहिला. १० मग हंगामास माळ्यांनीं आपणाला द्राक्षमळ्यांतील कांहीं फळें द्यावीं म्हणून त्यानें त्यांजकडे एका दासास पाठविलें; परंतु माळ्यांनीं त्याला ठोक देऊन रिकामें लावून दिलें. ११ पुनः त्यानें दुसऱ्या एका दासास पाठविलें; त्यालाहि त्यांनीं ठोक देऊन व त्याचा अपमान करून रिकामें लावून दिलें. १२ पुनः त्यानें तिसऱ्याला पाठविलें; त्यालाहि त्यांनीं घायाळ करून बाहेर घालवून दिलें. १३ तेव्हां द्राक्षमळ्याचा धनी म्हणाला, मी काय करूं? मी आपल्या प्रिय पुत्राला पाठवितों, कदाचित् ते त्याचा मान राखतील; १४ परंतु माळी त्याला पाहून आपसांत विचार करून म्हणाले, हा तर वारीस आहे; आपण याला जिवें मारूं म्हणजे वतन आपलेंच होईल. १५ मग त्यांनीं त्याला द्राक्षमळ्याच्या बाहेर काढून जिवें मारिलें; तर द्राक्षमळ्याचा धनी त्यांचें काय करील? १६ तो येऊन त्या माळ्यांचा नाश करील व द्राक्षमळा दुसऱ्यांस देईल. हें ऐकून ते म्हणाले, असें न घडो. १७ त्यानें त्यांजकडे दृष्टि लावून म्हटलें, तर

जो दगड बांधणाऱ्यांनीं नापसंत केला
तोच कोनशिला झाला आहे,

असें जें लिहिलें आहे तें काय? १८ जो कोणी त्या धोंड्यावर पडेल त्याचा चुराडा होईल; परंतु ज्या कोणावर तो पडेल त्याचा तो भुगाभुगा करून टाकील.

### कर देण्याबाबत प्रश्न

१९ तेव्हां शास्त्री व मुख्य याजक यांनीं त्याच घटकेस त्याजवर हात टाकावयास पाहिलें; पण त्यांना लोकांची भीति वाटली; हा दाखला त्यानें आपणांस उद्देशून दिला असें ते समजले. २० ते त्याच्या पाळतीवर राहिले आणि त्याला बोलण्यांत धरून सुभेदाराच्या कह्यांत व सत्तेच्या कक्षेंत आणावें म्हणून त्यांनीं धार्मिक लोकांचें सोंग घेतलेले हेर पाठविले. २१ त्यांनीं त्याला म्हटलें, गुरुजी, आपण यथार्थ बोलतां व शिक्षण देतां; पक्षपात करीत नाहीं, तर देवाचा मार्ग खरोखर शिकवितां, हें आम्ही जाणून आहों; २२ कैसराला पट्टी देणें हें आम्हांस योग्य आहे कीं नाहीं? २३ तो त्यांचें कपट ओळखून त्यांस म्हणाला, मला एक पावली दाखवा. २४ हिजवर मुखवटा व लेख कोणाचा आहे? ते म्हणाले, कैसराचा. २५ तेव्हां त्यानें त्यांस म्हटलें, तर कैसराचें तें कैसराला व देवाचें तें देवाला भरून द्या. २६ तेव्हां त्यांच्यानें लोकांसमक्ष ह्या त्याच्या बोलण्यांत त्याला धरवेना; आणि त्याच्या उत्तराचें आश्चर्य वाटून ते स्तब्ध राहिले.

### पुनरुत्थानविषयक प्रश्न

२७ नंतर, पुनरुत्थान नाहीं, असें म्हणणाऱ्या सदूक्यांतून कित्येकांनीं जवळ येऊन त्याला विचारिलें, २८ गुरुजी, मोशानें आम्हांसाठीं असें लिहिलें आहे कीं 'कोणाएकाचा भाऊ' स्त्री असतां 'मेला व त्याला संतति नसली तर त्याच्या भावानें त्या स्त्रीबरोबर विवाह करून आपल्या भावाचा वंश चालवावा.' २९ असे कोणी सात भाऊ होते; त्यांच्यांतील पहिल्यानें बायको केली व तो निःसंतान असा मेला. ३० मग दुसऱ्यानें व तिसऱ्यानेंहि ती केली; ३१

बाप्रमाणें सातहि निःसंतान असे मेले. ३२ नंतर ती
बायकोहि मेली. ३३ तर पुनरुत्थानसमयीं ती त्यांच्यांतून
कोणाची बायको होईल? कारण ती त्या सातांची बायको झाली
होती. ३४ येशूनें त्यांस म्हटलें, या युगाचे पुत्र लग्न करून
घेतात व लग्न करून देतात; ३५ परंतु तें युग व मेलेल्यां-
तून पुनः उठणें हीं प्राप्त करून घ्यावयास जे योग्य ठरतील
ते लग्न करून घेणार नाहींत व लग्न करून देणार नाहींत;
३६ आणि ते पुढें मरावयाचेहि नाहींत. कारण ते देव-
दूतांसमान आहेत, आणि पुनरुत्थानाचे पुत्र असल्यामुळें
देवाचे पुत्र आहेत. ३७ आणखी मेलेले उठतात हें मोशा-
नेंहि झुडपाच्या प्रकरणांत, 'प्रभूला अब्राहामाचा देव,
इसहाकाचा देव व याकोबाचा देव' असें म्हणून दर्शविलें
आहे; ३८ तो मृतांचा देव नव्हे, तर जीवंतांचा आहे;
त्याला सर्वच जीवंत आहेत. ३९ तेव्हां शास्त्र्यांतील कित्ये-
कांनीं म्हटलें, गुरुजी, ठीक बोललां; ४० मग ते त्याला
आणखी प्रश्न करावयास धजले नाहींत.

### ख्रिस्त दाविदाचा पुत्र आहे काय ?

४१ त्यावर त्यानें त्यांस म्हटलें, ख्रिस्त दावि-
दाचा पुत्र आहे असें कसें म्हणतात ? ४२ कारण
दावीद स्वतः स्तोत्रांच्या पुस्तकांत म्हणतो,

परमेश्वरानें माझ्या प्रभूला सांगितलें,
४३ मी तुझ्या शत्रूंना तुझ्या पायांचें आसन करीन
तोंपर्यंत माझ्या उजवीकडे बैस.

४४ दावीद त्याला प्रभु असें म्हणतो, तर मग तो
त्याचा पुत्र कसा आहे ?

### शास्त्र्यांसंबंधानें दिलेला इशारा

४५ तेव्हां सर्व लोक ऐकत असतां त्यानें आपल्या
शिष्यांस म्हटलें, ४६ शास्त्र्यांसंबंधानें सावध असा,
त्यांस लांबलांब झगे घालून फिरावयास पाहिजे;
बाजारांत नमस्कार, सभास्थानांत श्रेष्ठ आसनें व
जेवणावळींत श्रेष्ठ स्थानें हीं त्यांना आवडतात;
४७ ते विधवांचीं घरें खाऊन टाकितात, आणि
ढोंगानें लांबलांब प्रार्थना करितात; त्यांस अधिक दंड
होईल.

### विधवेची टोली

१ मग त्यानें दृष्टि वर करून जे धनवान्
२१ आपलीं दानें मंदिराच्या भांडारांत टाकीत
होते त्यांस पाहिलें. २ त्यानें एका दरिद्री
विधवेलाहि दोन टोल्या तेथें टाकितांना पाहिलें, ३
तेव्हां तो म्हणाला, मी तुम्हांस खरें सांगतों, या
दरिद्री विधवेनें सर्वांपेक्षां अधिक टाकिलें; ४ कारण त्या
सर्वांनीं आपल्या समृद्धींतून दानांत टाकिलें; हिनें तर
आपल्या कमताईतून आपली सर्व उपजीविका टाकिली.

### यरुशलेमाचा नाश व युगाची समाप्ति यांविषयींचें भविष्य येशू वर्तवितो

५ मंदिर उत्तम पाषाणांनीं व अर्पणांनीं कसें सुशो-
भित केलेलें आहे, असें कित्येक बोलत असतां त्यानें
म्हटलें, ६ हें जें तुम्ही पाहतां त्यांतला पाडला
जाणार नाहीं असा दगडावर दगड राहणार नाहीं,
असे दिवस येतील. ७ तेव्हां त्यांनीं त्याला विचारिलें,
गुरुजी, या गोष्टी केव्हां होतील, आणि ज्या काळीं
या गोष्टी घडणार त्या काळाचें काय चिन्ह ? ८ तो
म्हणाला, तुम्ही फसूं नये म्हणून जपा; कारण माझ्या
नामानें पुष्कळ लोक येऊन मीच तो आहें, आणि तो
काळ जवळ आला आहे, असें म्हणतील; त्यांच्यामागें
लागूं नका. ९ लढाया व दंगे यांविषयीं तुम्ही ऐकाल
तेव्हां घाबरूं नका; कारण या गोष्टी प्रथम 'होणें
अवश्य आहे,' तरी इतक्यानें शेवट होत नाहीं.
१० तेव्हां त्यानें त्यांस म्हटलें, 'राष्ट्रावर राष्ट्र व
राज्यावर राज्य उठेल;' ११ मोठे भूमिकंप, जागो-
जागीं दुष्काळ व मऱ्या होतील, आणि भयंकर उत्पात
व मोठीं चिन्हें आकाशांतून होतील; १२ परंतु हें
सर्व होण्याअगोदर ते तुम्हांवर हात टाकितील व
तुमचा छळ करितील; तुम्हांस सभास्थानें व बंदिशाळा
यांच्या स्वाधीन करितील, आणि राजे व अधिकारी
यांजपुढें माझ्या नामामुळें नेतील. १३ हें तुम्हांस
साक्ष देण्यास कारण होईल. १४ यास्तव उत्तर कसें
द्यावें यांविषयीं पूर्वी विचार न करण्याचा निर्धार
मनांत ठेवा; १५ कारण मी तुम्हांस अशी वाचा व

बुद्धि देईन कीं ती अडविण्यास किंवा तिच्याविरुद्ध
बोलण्यास तुमचे कोणी शत्रु समर्थ होणार नाहींत.
१६ आईबाप, भाऊबंद, नातलग व मित्र हे देखील
तुम्हांस धरून देतील; तुमच्यांतील कित्येकांस जिवें
मारवितील; १७ आणि माझ्या नामामुळें सर्व लोक
तुमचा द्वेष करितील; १८ तरी तुमच्या मस्तकाच्या
एका केसाचाहि नाश होणार नाहीं. १९ तुम्ही
आपल्या धीरानें आपले जीव मिळवाल.

२० ह्यावर यरुशलेमास सैन्यांचा वेढा पडत आहे
असें पाहाल तेव्हां त्याचा विध्वंस जवळ आला आहे
असें समजा. २१ त्या समयीं जे यहूदीयांत असतील
त्यांनीं डोंगरांत पळून जावें, जे यरुशलेमांत असतील
त्यांनीं बाहेर जावें; व जे शिवारांत असतील त्यांनीं
त्यांत येऊं नये. २२ कारण सर्व लिहिलेल्या गोष्टी
पूर्ण होण्यासाठीं हे 'सूड घेण्याचे दिवस' आहेत.
२३ त्या दिवसांत ज्या गरोदर व ज्या स्तन पाज-
णाऱ्या असतील त्यांचें दुःख फारच होणार! कारण
देशावर मोठें संकट येईल व या लोकांवर क्रोध होईल.
२४ ते तरवारीच्या धारेनें पडतील, त्यांस बंदिवान करून
सर्व राष्ट्रांमध्यें नेतील, आणि विदेश्यांचे काळ पूर्ण होत
तोंपर्यंत 'विदेशी लोक यरुशलेमास पायांखालीं तुडवितील.'
२५ तेव्हां सूर्य, चंद्र व तारे यांत चिन्हें होतील
आणि 'समुद्र व लाटा यांच्या गर्जनेनें' 'राष्ट्रें'
पृथ्वीवर घाबरीं होऊन पेचांत पडतील; २६ भयानें
व जगावर येणाऱ्या गोष्टींची वाट पाहण्यानें मनुष्यें
मूर्छित होतील; 'आकाशांतील बळें डळमळतील.'
२७ त्या काळीं लोक 'मनुष्याच्या पुत्राला' पराक्रमानें
व मोठ्या वैभवानें 'मेघारूढ होऊन येतांना' पाह-
तील. २८ या गोष्टींस आरंभ होऊं लागेल तेव्हां
नीट उभे राहा, आणि आपलीं डोकीं वर करा;
कारण तुमची मुक्तता समीप आली आहे.

### जागृतीची आवश्यकता

२९ त्यानें त्यांस दाखला सांगितला: अंजीर
व सर्व झाडें पाहा; ३० तीं फुटूं लागलीं म्हणजे
तुम्ही तें पाहून आपणच ओळखतां कीं आतां उन्हाळा
जवळ आला आहे. ३१ तसेंच या गोष्टी होतांना
पाहाल तेव्हां देवाचें राज्य जवळ आलें आहे
असें समजा. ३२ मी तुम्हांस खचीत सांगतों कीं सर्व
गोष्टी पूर्ण होत तोंपर्यंत ही पिढी नाहींशी होणार नाहीं.
३३ आकाश व पृथ्वी नाहींतशीं होतील; परंतु माझीं
वचनें नाहींतशीं होणारच नाहींत.

३४ तुम्ही आपणांस संभाळा, नाहींतर कदाचित् गुंगी,
दारूबाजी व संसाराच्या चिंता यांनीं तुमचीं अंतःकरणें
जड होऊन तो दिवस 'पाशाप्रमाणें' अकस्मात् तुम्हांवर
येईल; ३५ कारण तो अवघ्या पृथ्वीतलावर 'राहणाऱ्या
सर्व लोकांवर' तसाच येईल. ३६ तुम्हीं तर या सर्व
होणाऱ्या गोष्टी चुकवावयास व मनुष्याच्या पुत्रासमोर
उभे राहावयास समर्थ व्हावें म्हणून सर्व प्रसंगीं प्रार्थना
करीत जागृत राहा.

३७ तो दिवसा मंदिरांत शिक्षण देत असे आणि
रात्रीस बाहेर जाऊन जैतूनांचा डोंगर ह्या नांवाच्या डोंगरा-
वर राहत असे. ३८ सर्व लोक त्याचें श्रवण करावयास
मोठ्या पहाटेस त्याजकडे मंदिरांत येत.

### यहूदानें केलेला विश्वासघात

२२ १ बेखमीर भाकरींचा सण, ज्याला वल्हांडण
म्हणतात तो, जवळ आला होता; २ तेव्हां मुख्य
याजक व शास्त्री हे त्याचा घात कसा करावा ह्या
विचारांत पडले होते; कारण त्यांना लोकांची भीति
वाटत होती.

३ तेव्हां बारांतील एक जण इस्कर्योत म्हटलेला यहूदा
यांत सैतान शिरला; ४ आणि तो निघून जाऊन मुख्य
याजक व सरदार यांच्या हातीं त्याला कसें धरून द्यावें
ह्याविषयीं त्यांजबरोबर बोलला. ५ तेव्हां त्यांस आनंद
झाला व त्यांनीं त्याला पैका देण्याचा करार केला. ६ त्याला
तें मान्य झालें, आणि गर्दी नसेल तेव्हां त्यांच्या हातीं
त्याला धरून देण्यास संधि पाहूं लागला.

### शेवटल्या भोजनाप्रीत्यर्थ तयारी

७ नंतर ज्या दिवशीं वल्हांडणाचा यज्ञपशु मारावयाचा,
तो बेखमीर भाकरींचा दिवस आला. ८ तेव्हां त्यानें पेत्र
व योहान यांस असें सांगून पाठविलें कीं आपण वल्हांडण

सणाचें भोजन करावें म्हणून तुम्ही जाऊन आपल्यासाठीं
तयारी करा. ९ ते त्याला म्हणाले, आम्हीं कोठें तयारी
करावी म्हणून आपली इच्छा आहे ? १० त्यानें त्यांस
सांगितलें, पाहा, तुम्हीं नगरांत प्रवेश केल्यावर पाण्याची
घागर घेऊन जाणारा एक मनुष्य तुम्हांस आढळेल; तो
ज्या घरांत जाईल त्यांत त्याच्यामागून जा; ११ आणि
त्या घराच्या धन्याला असें सांगा: गुरु तुला म्हणतो,
मला आपल्या शिष्यांसह वल्हांडणाचें भोजन करितां येईल
अशी भोजनाची जागा कोठें आहे ? मग तो तुम्हांस
सजविलेली मोठी माडी दाखवील; १२ तेथें तयारी करा.
१३ तेव्हां ते गेले व त्यांस त्यानें सांगितल्याप्रमाणें
आढळलें; आणि त्यांनीं वल्हांडणाची तयारी केली.

## शेवटलें भोजन

१४ नंतर वेळ झाली तेव्हां तो जेवावयास बसला व
त्याजबरोबर प्रेषितहि बसले. १५ तेव्हां तो त्यांस म्हणाला,
मीं दुःख भोगण्यापूर्वी हें वल्हांडणाचें भोजन तुम्हांबरोबर
करावयाची माझी फार उत्कट इच्छा होती; १६ कारण
मी तुम्हांस सांगतों कीं देवाच्या राज्यांत हें पूर्ण होईपर्यंत
मी हें भोजन पुनः करणार नाहीं. १७ मग प्याला स्वीका-
रून व ईशोपकारस्मरण करून तो म्हणाला, हा घ्या,
आणि आपणांत ह्याची वांटणी करा; १८ मी तुम्हांस
सांगतों कीं देवाचें राज्य येईपर्यंत द्राक्षवेलाचा उपज यापुढें
मी पिणार नाहीं. १९ मग त्यानें भाकरी घेऊन व ईशोप-
कारस्मरण करून ती मोडिली, आणि त्यांस देऊन म्हटलें,
तुम्हांसाठीं दिलें जात आहे असें हें माझें शरीर आहे,
माझ्या स्मरणार्थ हें करा. २० त्याप्रमाणें भोजन झाल्यावर
त्यानें प्याला घेऊन म्हटलें, हा प्याला तुम्हांसाठीं ओतिलें
जात आहे असें जें माझें 'रक्त त्यांत नवा करार' आहे;
२१ पण पाहा, मला धरून देणाऱ्याचा हात मजबरोबर
मेजावर आहे. २२ मनुष्याचा पुत्र ठरविल्याप्रमाणें जातो
खरा, परंतु ज्याच्या हातून तो धरून दिला जातो त्या
मनुष्याला धिक्कार असो ! २३ तेव्हां हें करणारा कोण
असावा, ह्याचा ते आपणांत विचार करूं लागले.

## खरा मोठेपणा

२४ आणखी, आपणांमध्यें कोण मोठा मानला जात
आहे, याविषयींहि त्यांमध्यें वाद झाला; २५ तेव्हां त्यानें
त्यांस म्हटलें, विदेश्यांचे राजे त्यांजवर प्रभुत्व चालवितात,
आणि जे त्यांजवर अधिकार करितात त्यांस परोपकारी
असें नांव देतात; २६ परंतु तुम्हीं तसें नसावें; तर तुम्हां-
मध्यें जो मोठा तो धाकट्यासारिखा व जो अधिकारी तो
सेवा करणाऱ्यासारिखा होवो. २७ मोठा कोण ? भोजनास
बसणारा किंवा सेवा करणारा ? भोजनास बसणारा कीं
नाहीं ? मी तर तुम्हांमध्यें सेवा करणाऱ्यासारिखा आहें;
२८ आणि माझ्या परीक्षांमध्यें माझ्याबरोबर टिकून राहिलेले
तुम्हीच आहां. २९ जसें माझ्या बापानें मला राज्य नेमून
दिलें तसें मीहि तुम्हांस नेमून देतों, ३० यासाठीं कीं तुम्हीं
माझ्या राज्यांत माझ्या मेजावर खावें व प्यावें; आणि तुम्हीं
राजासनांवर बसून इस्राएलाच्या बारा वंशांचा न्याय करावा.

## पेत्र आपला इनकार करणार हें येशू आधींच सांगून ठेवतो

३१ शिमोना, शिमोना, पाहा, तुम्हांस गव्हासारिखें
चाळावें म्हणून सैतानानें तुम्हांस मागितलें; ३२ परंतु तुझा
विश्वास नाहींसा होऊं नये म्हणून तुझ्यासाठीं मीं विनंति
केली आहे; आणि तूं वळलास, म्हणजे आपल्या भावांस
स्थिर कर. ३३ तो त्याला म्हणाला, प्रभुजी, मी आपणा-
बरोबर बंदिशाळेंत व मरावयालाहि जाण्यास तयार आहें.
३४ तो म्हणाला, पेत्रा, मी तुला सांगतों, तूं मला ओळख-
तोस हें तीन वेळां नाकारशील तोंपर्यंत आज कोंबडा
आरवणार नाहीं.

३५ आणखी त्यानें त्यांस म्हटलें, मीं तुम्हांस पिशवी,
झोळी व वाहणा यांवांचून पाठविलें तेव्हां तुम्हांस कांहीं
उणें पडलें काय ? ते म्हणाले, कांहीं नाहीं. ३६ त्यानें
त्यांस म्हटलें, आतां तर ज्याच्याजवळ पिशवी आहे त्यानें
ती घ्यावी; त्याप्रमाणें झोळीहि घ्यावी आणि ज्याच्याजवळ
तरवार नाहीं त्यानें आपलें वस्त्र विकून ती विकत घ्यावी.
३७ मी तुम्हांस सांगतों, 'तो अपराध्यांत गणलेला होता,'
असें जें लिहिलें आहे तें माझ्या ठायीं पूर्ण झालें पाहिजे,
कारण मजविषयींच्या गोष्टींचा शेवट आला आहे. ३८ ते
म्हणाले, प्रभुजी, पाहा, या दोन तरवारी आहेत. तो त्यांस
म्हणाला, पुरे.

### गेथशेमाने बागेंत येशू

३९ यावर तो बाहेर येऊन आपल्या परिपाठाप्रमाणें
जैतूनांच्या डोंगराकडे गेला व त्याचे शिष्यहि त्याच्या मागें-
मागें गेले. ४० त्या ठिकाणीं आल्यावर त्यानें त्यांस म्हटलें,
तुम्हीं परीक्षेंत पडूं नये म्हणून प्रार्थना करा. ४१ मग
त्यांजपासून सुमारें धोंड्याच्या टप्प्याइतका तो दूर झाला;
आणि त्यानें गुडघे टेकून अशी प्रार्थना केली : ४२ हे बापा,
तुझी इच्छा असली तर हा प्याला मजपासून दूर कर, तरी
माझ्या इच्छेप्रमाणें नको, तुझ्या इच्छेप्रमाणें होऊं दे; ४३
तेव्हां स्वर्गाहून एक देवदूत येऊन आपणाला बळ देतांना
त्याच्या दृष्टीस पडला. ४४ मग अत्यंत विव्हळ होऊन
त्यानें अधिक आग्रहानें प्रार्थना केली, तेव्हां त्याचा घाम
रक्ताचे मोठमोठे थेंब भूमीवर पडावे असा पडत होता. ४५
प्रार्थना करून उठल्यावर तो शिष्यांजवळ आला तों ते
खेदामुळें झोंपीं गेले आहेत असें त्यास आढळलें. ४६ तो
त्यांस म्हणाला, झोप कां घेतां ? तुम्हीं परीक्षेंत पडूं नये
म्हणून उठून प्रार्थना करा.

### येशूला अटक करण्यांत येते

४७ तो बोलत आहे इतक्यांत पाहा, लोकसमुदाय
आला, व यहूदा नांवाचा बारांतला एक जण त्यांच्यापुढें
चालत होता; तो येशूचें चुंबन घ्यावयास त्याच्याजवळ
आला. ४८ येशू त्याला म्हणाला, यहूदा, चुंबन घेऊन
मनुष्याच्या पुत्राला धरून देतोस काय ? ४९ त्याच्यासमो-
वतीं जे होते ते आतां काय होणार हें ओळखून त्याला
म्हणाले, प्रभुजी, आम्हीं तरवार चालवावी काय ? ५०
त्यांतील एकानें प्रमुख याजकाच्या दासावर हात टाकून
त्याचा उजवा कान कापून काढिला. ५१ तेव्हां येशूनें
म्हटलें, त्यांचें एवढें होऊं द्या, आणि त्यानें त्याच्या कानाला
स्पर्श करून त्याला बरें केलें. ५२ जे मुख्य याजक, मंदि-
राचे सरदार व वडील त्याच्यावर आले होते त्यांस येशू
म्हणाला, जसें लुटारूवर जावें तसें तुम्ही तरवारी व सोटे
घेऊन निघालां काय ? ५३ मी प्रतिदिवशीं मंदिरांत तुमच्या-
बरोबर असतांना तुम्हीं मजवर हात टाकिला नाहीं, पण
ही तुमची घटका आणि अंधाराची सत्ता आहे.

### पेत्र येशूचा इन्कार करतो

५४ मग त्यांनीं त्याला पकडून प्रमुख याजकाच्या घरीं
नेलें; तेव्हां पेत्र दुरून मागेंमागें चालूं लागला. ५५ ते
राजांगणाच्या मध्यभागीं विस्तव पेटवून एकत्र बसले होते,
त्यांजमध्यें पेत्र जाऊन बसला. ५६ तेव्हां कोणाएका
दासीनें त्याला विस्तवाच्या उजेडांत बसलेलें पाहून त्याज-
कडे टक लावून म्हटलें, हाहि त्याजबरोबर होता; पण तो
नाकारून बोलला, ५७ बाई, मी त्याला ओळखत नाहीं. ५८
कांहीं वेळानें दुसऱ्या एकानें त्याला पाहून म्हटलें, तूंहि
त्यांतला आहेस; पेत्र म्हणाला, गृहस्था, मी तो नाहीं. ५९
सुमारें एक तास झाल्यावर आणखी एक जण खातरीनें
म्हणाला, खरोखर हाहि त्याजबरोबर होता; हा गालीलीच
आहे. ६० पेत्र म्हणाला, गृहस्था, तूं काय बोलतोस तें
मला समजत नाहीं. असें तो बोलत आहे इतक्यांत कोंबडा
आरवला. ६१ तेव्हां प्रभूनें वळून पेत्राकडे दृष्टि लाविली;
आणि आज कोंबडा आरवण्याअगोदर तूं तीन वेळां
मला नाकारिशील, असें जें प्रभूनें सांगितलें होतें तें पेत्राला
आठवलें. ६२ मग तो बाहेर जाऊन फार रडला.
६३ ज्या मनुष्यांनीं येशूला धरिलें होतें त्यांनीं त्याची
थट्टा करून त्याला मार दिला. ६४ त्यांनीं त्याचे डोळे
बांधून त्याला विचारिलें, अंतर्ज्ञानानें बोल; तुला कोणीं
मारिलें हें सांग. ६५ त्यांनीं त्याची निंदा करून त्याच्या-
विरुद्ध इतर पुष्कळ गोष्टी उच्चारिल्या.

### मुख्य याजकापुढें येशू

६६ मग दिवस उगवल्यावर लोकांचें वडीलमंडळ, मुख्य
याजक व शास्त्री एकत्र जमले; आणि ते त्याला आपल्या
न्यायसभेंत नेऊन म्हणाले, ६७ तूं ख्रिस्त असलास तर आम्हांस
सांग. त्यानें त्यांस म्हटलें, मीं तुम्हांस सांगितलें तरी तुम्ही
विश्वास धरणार नाहीं; ६८ आणि मीं विचारिलें तरी तुम्ही
उत्तर देणार नाहीं; ६९ तरी एथून पुढें मनुष्याचा पुत्र
सर्वसमर्थ देवाच्या उजवीकडे बसेल. ७० तेव्हां ते सर्व
म्हणाले, तर तूं देवाचा पुत्र आहेस काय ? तो म्हणाला,
मी आहें म्हणून तुम्ही म्हणतां. ७१ तेव्हां ते म्हणाले,
आपल्याला साक्षीची आणखी काय गरज ? आपण
स्वतः याच्याच तोंडचें ऐकलें आहे.

## रोमी सुभेदार पिलात याच्यापुढें येशू

१ नंतर त्या सर्व मंडळीनें उठून त्याला
२३ पिलाताकडे नेलें; २ आणि ते त्याजवर
असा दोष ठेवूं लागले कीं हा आमच्या
राष्ट्राला फितवितांना, कैसराला पट्टी देणें मना करि-
तांना, आणि मी स्वतः ख्रिस्त राजा आहें असें म्हणतांना
आम्हांस आढळला. ३ तेव्हां पिलातानें त्याला विचारिलें
कीं तूं यहूद्यांचा राजा आहेस काय? त्यानें त्याला
उत्तर दिलें, तूं म्हणतोस. ४ तेव्हां मुख्य याजकांस
व लोकसमुदायांस पिलातानें म्हटलें, मला या मनु-
ष्याच्या ठायीं कांहीं दोष आढळत नाहीं. ५ तरी ते
अधिकच आग्रह धरून म्हणाले, हा गालीलापासून
आरंभ करून एथपर्यंत अवघ्या यहूदीयांत शिक्षण देऊन
लोकांस चिथवितो.

## हेरोदाच्यापुढें येशू

६ तेव्हां पिलातानें हें ऐकून हा मनुष्य गालीली
आहे काय, असें विचारिलें; ७ आणि तो हेरोदाच्या
अमलांतला आहे असें समजल्यावर त्यानें त्याला
हेरोदाकडे पाठविलें. तोहि त्या दिवसांत यरुशलेमांत
होता.

८ येशूला पाहून हेरोदाला फार संतोष झाला;
कारण त्याजविषयीं ऐकल्यावरून त्याला भेटावें अशी
बऱ्याच दिवसांपासून त्याची इच्छा होती, आणि
त्याच्या हातून झालेलें एकादें अद्भुत कृत्य दृष्टीस
पडेल अशी त्याला आशा होती. त्यानें त्याला बरेच
प्रश्न केले; ९ परंतु त्यानें त्याला कांहीं उत्तर दिलें
नाहीं. १० तेव्हां मुख्य याजक व शास्त्री यांनीं
उभें राहून आवेशानें त्याजवर दोष ठेविले; ११
आणि हेरोदानें व त्याच्या शिपायांनीं त्याचा धिक्कार
व उपहास करून आणि त्याला झळझळीत वस्त्रें
लेववून पिलाताकडे परत पाठविलें. १२ त्याच दिवशीं
पिलात व हेरोद हे परस्पर मित्र झाले; त्यापूर्वी
त्यांचें आपसांत वैर होतें.

## पिलात, बरब्बा व येशू

१३ मग पिलातानें मुख्य याजक, अधिकारी व
लोक यांस एकत्र बोलावून म्हटलें, १४ हा मनुष्य
लोकांस फितविणारा म्हणून ह्याला तुम्हीं मजकडे आणिलें.
आणि पाहा, मी तुमच्यादेखतां याची चौकशी केल्यावर
ज्या गोष्टींचा आरोप तुम्ही याजवर आणितां त्यां-
संबंधीं या मनुष्याकडे कांहीं दोष मला आढळला नाहीं;
१५ हेरोदालाहि नाहीं; कारण त्यानें त्याला आपल्या-
कडे परत पाठविलें; आणि पाहा, यानें मरण-
दंडास योग्य असें कांहीं केलें नाहीं. १६ यास्तव
मी ह्याला फटके मारून सोडून देतों; [ १७ आणखी
त्या सणांत त्याला त्यांकरितां एका जणाला सोडावें
लागत असे. ] १८ परंतु सर्वांनीं एकच आरोळी
करून म्हटलें, याची वाट लावा, आणि आम्हांसाठीं
बरब्बाला सोडून द्या. १९ तो इसम नगरांत झालेला
दंगा व खून यांमुळें बंदींत टाकिलेला होता. २०
येशूला सोडावें ह्या इच्छेनें पिलातानें पुनः त्यांजबरोबर
भाषण केलें; २१ तरी त्यांनीं, याला वधस्तंभावर
खिळा, वधस्तंभावर खिळा, अशी ओरड केली. २२
तो त्यांस तिसऱ्यानें म्हणाला, कां? त्यानें काय
वाईट केलें आहे? त्याजकडे मरणास योग्य असा
कांहीं दोष मला आढळला नाहीं; यास्तव मी याला
फटके मारून सोडून देतों; २३ पण याला वधस्तं-
भाशीं खिळावें असा त्यांनीं मोठ्यानें ओरडून आग्रह
केला; आणि त्यांच्या ओरडण्याला यश आलें. २४
तेव्हां पिलातानें त्यांच्या मागण्याप्रमाणें व्हावें असा
ठराव केला. २५ नंतर दंगा व खून यांमुळें बंदींत
टाकिलेल्या ज्या एकाला त्यांनीं मागितलें त्याला
त्यानें सोडून दिलें; आणि येशूला त्यांच्या मर्जीवर
सोपून दिलें.

## येशूला वधस्तंभीं खिळतात

२६ पुढें ते त्याला घेऊन जात असतां शिमोन
कुरेनेकर हा इसम रानांतून येत होता, त्याला त्यांनीं
धरून त्याजवर वधस्तंभ ठेविला आणि तो त्याला
येशूच्या मागें वाहण्यास लाविलें.

२७ तेव्हां त्याच्यामागें लोकांचा व त्याच्यासाठीं
ऊर बडवून घेऊन शोक करीत असलेल्या अशा

स्त्रियांचाहि मोठा समुदाय चालला होता; २८ येशू
त्यांजकडे वळून म्हणाला, अहो यरुशलेमकर कन्यांनो,
मजसाठीं रडूं नका, तर आपणांसाठीं व आपल्या
मुलांबाळांसाठीं रडा. २९ कारण पाहा, असे दिवस
येतील कीं ज्यांत वांझ, न प्रसवलेलीं उदरें, व न
पाजिलेले स्तन हीं धन्य आहेत असें म्हणतील.
३० त्या समयीं ते ‘पर्वतांस म्हणूं लागतील, आम्हांवर
पडा; व टेकड्यांस म्हणतील, आम्हांस झाका.’ ३१ ओल्या
झाडाला असें करितात तर वाळलेल्याचें काय होईल?

३२ त्याच्याबरोबर दुसऱ्या दोघां जणांस अप-
राधी म्हणून वध करण्यासाठीं नेलें.

३३ नंतर ते कंवटी म्हटलेल्या जागीं आले,
तेव्हां तेथें त्यांनीं त्याला व त्या अपराध्यांस, एकाला
त्याच्या उजवीकडे व एकाला डावीकडे, असें वध-
स्तंभावर खिळिलें. ३४ तेव्हां येशू म्हणाला, हे बापा,
त्यांना क्षमा कर; कारण हे काय करितात हें त्यांस
समजत नाहीं. ‘नंतर त्यांनीं चिठ्या टाकून त्याचीं
वस्त्रें वांटून घेतलीं.’ ३५ लोक ‘पाहत’ उभे होते;
अधिकारीहि ‘उपहास करीत म्हणाले,’ त्यानें दुस-
ऱ्यांस तारिलें, जर तो देवाचा ख्रिस्त, त्याचा
निवडलेला असला तर त्यानें स्वतःचा बचाव करावा.
३६ शिपायांनींहि जवळ येऊन, त्याला आंब देऊन,
त्याची अशी थट्टा केली कीं ३७ तूं यहूद्यांचा
राजा असलास तर स्वतःचा बचाव कर.

३८ **हा यहूद्यांचा राजा आहे,** असा एक लेखहि
त्याच्यावरतीं होता.

३९ वधस्तंभावर खिळिलेल्या त्या अपराध्यांतील
एकानें त्याची निंदा करून म्हटलें, तूं ख्रिस्त आहेस ना?
तर स्वतःचा व आमचा बचाव कर; ४० परंतु दुसऱ्यानें
त्याला धमकावून म्हटलें, तुलाहि तोच दंड असतां तूं
देवाला भीत नाहींस काय? ४१ आपला दंड तर
यथान्याय आहे; कारण आपण आपल्या कर्मांचें योग्य
फळ भोगीत आहों; परंतु यानें कांहीं अयोग्य केलें
नाहीं. ४२ मग तो म्हणाला, हे येशू, तूं आपल्या
राज्याधिकारानें येशील तेव्हां माझी आठवण कर. ४३
तो त्याला म्हणाला, मी तुला खचीत सांगतों, तूं
आज मजबरोबर सुखलोकांत असशील.

### येशूचा मृत्यु

४४ इतक्यांत सुमारें दोन प्रहर झाले, आणि
सूर्यप्रकाश नाहींसा होऊन तिसऱ्या प्रहरापर्यंत सर्व
देशावर अंधार पडला; ४५ आणि पवित्रस्थानांतील
पडदा मधोमध फाटला. ४६ तेव्हां येशू उच्च स्वरानें
ओरडून म्हणाला, हे बापा, ‘मी आपला आत्मा तुझ्या
हातीं सोपून देतों;’ असें बोलून त्यानें प्राण सोडला;
४७ तेव्हां झालेलें पाहून जमादारानें देवाचें गौरव
करून म्हटलें, खरोखर हा मनुष्य धार्मिक होता.
४८ हा प्रकार पाहण्याकरितां जमलेले सर्व लोक-
समुदाय झालेल्या गोष्टी पाहून ऊर बडवीत माघारे
गेले. ४९ तेव्हां त्याच्या ‘ओळखीचे’ सर्व जण व
ज्या बायका त्याच्यामागें गालीलाहून आल्या होत्या
त्या हें पाहत ‘दूर उभ्या राहिल्या होत्या.’

### येशूला खडकांत खोदलेल्या कबरेंत ठेवतात

५० तेव्हां पाहा, यहूद्यांच्या अरिमथाई नगरांतला
योसेफ नामक एक मनुष्य होता, तो मंत्री असून
सज्जन व धार्मिक असा होता; ५१ त्यानें त्यांच्या
विचाराला व कामाला संमति दिली नव्हती, व तो
देवाच्या राज्याची वाट पाहत होता. ५२ त्यानें
पिलाताकडे जाऊन येशूचें शरीर मागितलें; ५३ तें
त्यानें खालीं काढून तागाच्या वस्त्रानें गुंडाळलें व
जिच्यांत तोंपर्यंत कोणाला ठेविलें नव्हतें अशा
खडकांत खोदलेल्या कबरेंत तें ठेविलें. ५४ तो
तयारी करण्याचा दिवस असून शब्बाथ सुरू होणार
होता. ५५ ज्या बायका गालीलाहून त्याच्याबरोबर आल्या
होत्या, त्यांनीं त्याच्यामागें येऊन ती कबर पाहिली, व
त्याचें शरीर कसें ठेविलें हेंहि पाहिलें. ५६ मग त्यांनीं
परत जाऊन सुगंधी द्रव्यें व सुगंधी तेलें तयार केलीं.

### रिकामी कबर

शब्बाथ दिवशीं आज्ञेप्रमाणें त्या स्वस्थ
२४ राहिल्या. १ आठवड्याच्या पहिल्या दिवशीं
मोठ्या पहांटेस आपण तयार केलेलं

सुगंधी द्रव्यें घेऊन त्या कबरेजवळ आल्या; २ तों
कबरेवरून धोंड लोटलेली आहे असें त्यांच्या दृष्टीस
पडलें. ३ त्या आंत गेल्यावर त्यांस प्रभु येशूचें
शरीर सांपडलें नाहीं. ४ मग असें झालें कीं
त्याविषयीं त्यांस भ्रांति पडली, तों पाहा, लखलखीत
वस्त्रें ल्यालेले दोन पुरुष त्यांच्याजवळ उभे राहिले.
५ तेव्हां भयभीत होऊन त्यांनीं आपलीं तोंडें
भूमीकडे केलीं असतां ते त्यांस म्हणाले, तुम्ही
जीवंताचा शोध मेलेल्यांमध्यें कां करितां ? ६ तो
एथें नाहीं, पण उठला आहे; तो गालीलांत असतां
त्यानें तुम्हांस काय सांगितलें त्याची आठवण करा :
७ तें असें कीं मनुष्याच्या पुत्राला पापी जनांच्या
हातीं धरून देण्यांत यावें, त्याला वधस्तंभावर खिळ-
ण्यांत यावें, व तिसऱ्या दिवशीं त्यानें पुनः उठावें,
याचें अगत्य आहे. ८ तेव्हां त्यांस त्याच्या बोल-
ण्याची आठवण झाली; ९ आणि कबरेपासून परत
येऊन त्यांनीं अकरा शिष्यांस व बाकीच्या सर्वांस
हें सगळें वर्तमान सांगितलें. १० त्या मग्दालीया
मरीया, योहान्ना व याकोबाची आई मरीया अशा
होत्या. त्यांजबरोबर ज्या दुसऱ्या होत्या त्यांनींहि
हें वर्तमान प्रेषितांस सांगितलें; ११ परंतु हें वर्तमान
त्यांस गप्प असें वाटलें, व त्यांनीं त्यांचें खरें मानिलें
नाहीं. १२ तेव्हां पेत्र उठून कबरेकडे धावत गेला,
व ओणवें होऊन त्यानें आंत पाहिलें तों केवळ
प्रेतवस्त्रें त्याला दिसलीं; तेव्हां झालेल्या गोष्टीविषयीं
आश्चर्य करीत तो आपल्या घरीं गेला.

### अम्माऊस गांवच्या रस्त्यावर येशू कांहीं शिष्यांना दर्शन देतो

१३ त्याच दिवशीं त्यांतील दोघे जण यरुशलेमा-
पासून सुमारें चार कोसांवरील अम्माऊस नामक
गांवास जात होते. १४ ते त्या घडलेल्या सर्व
गोष्टींविषयीं परस्पर संभाषण करीत होते; १५ आणि
असें झालें कीं ते संभाषण व चर्चा करीत असतांना
येशू स्वतः जवळ येऊन त्यांच्याबरोबर चालूं लागला;
१६ परंतु त्यांनीं त्याला ओळखूं नये म्हणून त्यांचे
डोळे आकळण्यांत आले होते. १७ त्यानें त्यांस
म्हटलें, तुम्ही चालतांना ज्या गोष्टी एकमेकांबरोबर
बोलत आहां त्या कोणत्या ? तेव्हां ते म्लानमुख
होऊन उभे राहिले. १८ मग त्यांच्यांतून क्लयपा नामें
एकानें त्याला उत्तर दिलें, आपण यरुशलेमांतून प्रवास
करीत असतां त्यांत या दिवसांमध्यें घडलेल्या गोष्टी
ज्याला ठाऊक नाहींत असें आपण एकटेच आहां काय ?
१९ तो त्यांस म्हणाला, कसल्या गोष्टी ? त्यांनीं त्याला
म्हटलें, नासरेथकर येशू याविषयींच्या; तो देवासमक्ष व
सर्व लोकांसमक्ष कृतीनें व भाषणानें पराक्रमी असा संदेष्टा
झाला. २० त्याला आमच्या मुख्य याजकांनीं व अधिका-
ऱ्यांनीं पकडून देहांतशिक्षेसाठीं वधस्तंभावर खिळिलें; २१
परंतु इस्राएलाची मुक्ति करणारा तो हाच अशी आमची
आशा होती. इतकेंच नव्हे तर या सर्व गोष्टी झाल्या,
त्याला आज तिसरा दिवस आहे. २२ आणखी आमच्यां-
तील ज्या कित्येक स्त्रिया कबरेकडे मोठ्या पहाटेस गेल्या
होत्या त्यांनीं आम्हांस विस्मित केलें. २३ त्यांस त्याचें
शरीर सांपडलें नाहीं, तेव्हां त्यांनीं येऊन सांगितलें कीं
आम्हांस देवदूतांचें दर्शन झालें; त्या देवदूतांनीं म्हटलें
कीं तो जीवंत आहे. २४ मग आमच्याबरोबर जे होते
त्यांपैकीं कित्येक कबरेकडे गेले आणि त्या स्त्रियांनीं सांगि-
तल्याप्रमाणें त्यांस आढळलें; पण त्यांना तो दिसला नाहीं.
२५ तो त्यांस म्हणाला, अहो निर्बुद्धि, व संदेष्ट्यांनीं
सांगितलेल्या सर्व गोष्टींचा विश्वास धरण्यास मतिमंद
मनुष्यांनो ! २६ ख्रिस्तानें हीं दुःखें सोसावीं आणि
आपल्या गौरवांत जावें, याचें अगत्य नव्हतें काय ? २७
मग त्यानें मोशे व सर्व संदेष्टे यांजपासून आरंभ करून
सगळ्या शास्त्रांतील आपणाविषयींच्या गोष्टींचा अर्थ त्यांस
सांगितला. २८ मग ज्या गांवास ते जात होते त्याजवळ
आले तेव्हां त्यानें पुढें जाण्याचा रोख दाखविला; २९
परंतु ते त्याला आग्रह करून म्हणाले, आमच्या एथें राहा;
कारण संध्याकाळ होत चालली असून दिवस उतरला आहे.
तेव्हां तो त्यांच्याबरोबर राहावयास आंत गेला. ३० मग
असें झालें कीं तो त्यांजबरोबर जेवावयास बसला असतां
त्यानें भाकर घेऊन आशीर्वाद दिला व ती मोडून त्यांस

दिली. ३१ तेव्हां त्यांचे डोळे मोकळे झाले व त्यांनीं
त्याला ओळखिलें; तों तो त्यांजपासून अंतर्धान पावला.
३२ तेव्हां ते एकमेकांस म्हणाले, तो वाटेनें आपल्याबरोबर
बोलत होता व शास्त्राचा उलगडा करीत होता तेव्हां आपलें
अंतःकरण आंतल्याआंत उकळत नव्हतें काय? ३३ त्याच
घटकेस ते उठून यरुशलेमास माघारे गेले, तेव्हां अकरा
शिष्य व त्यांच्याबरोबर एकत्र झालेले लोक त्यांस आढळले.
३४ ते म्हणत होते कीं प्रभु खरोखर उठला आहे, व
शिमोनाच्या दृष्टीस पडला आहे. ३५ मग त्यांनीं वाटेंतील
गोष्टी आणि त्यानें भाकर मोडिली तेव्हां आपण त्याला
कसें ओळखिलें, हें निवेदन केलें.

### येशू प्रेषितांना दर्शन देतो

३६ ते या गोष्टी सांगत असतां तो स्वतः त्यांच्यामध्यें
उभा राहिला व त्यांस म्हणाला, तुम्हांस शांति असो. ३७
तरी ते घाबरून भयभीत झाले, आणि आपण कोणी भूत
पाहत आहों असें त्यांस वाटलें. ३८ त्यानें त्यांस म्हटलें,
तुम्ही कां घाबरलां, व तुमच्या मनांत तर्कवितर्क कां
उठतात? ३९ माझे हातपाय पाहा; मीच तो आहें; मला
चाचपून पाहा; जसें मला हाडमांस आहे म्हणून पाहतां
तसें भूताला नसतें. ४० असें बोलून त्यानें त्यांस आपले
हातपाय दाखविले. ४१ मग आनंदामुळें त्यांस तें खरें न
वाटून ते आश्चर्य करीत असतां त्यानें त्यांस म्हटलें, एथें
तुम्हांजवळ कांहीं खावयाला आहे काय? ४२ मग त्यांनीं
त्याला भाजलेल्या माशाचा तुकडा दिला; ४३ तो घेऊन
त्यानें त्यांच्यादेखत खाल्ला.

४४ त्यावर त्यानें त्यांस म्हटलें, मी तुमच्याबरोबर
असतांना तुम्हांस सांगितलेलीं माझीं वचनें हींच आहेत
कीं मोशाचें नियमशास्त्र, संदेष्टे व स्तोत्रें यांत मजविषयीं
जें लिहिलेलें आहे तें सर्व पूर्ण होणें अवश्य आहे. ४५
तेव्हां त्यांस शास्त्रबोध व्हावा म्हणून त्यानें त्यांचें मन
उघडिलें; ४६ आणि त्यानें त्यांस म्हटलें, असें लिहिलें
आहे कीं ख्रिस्तानें दुःख सोसावें, तिसऱ्या दिवशीं मेलेल्यां-
मधून उठावें, ४७ आणि यरुशलेमापासून आरंभ करून
सर्व राष्ट्रांस त्याच्या नामानें पश्चात्ताप व पापक्षमा गाज-
विण्यांत यावी. ४८ या गोष्टींचे साक्षी तुम्ही आहां; ४९
पाहा, माझ्या पित्यानें वचन दिलेली देणगी मी तुम्हांकडे
पाठवितों; तुम्ही वरून सामर्थ्ययुक्त व्हाल तोंपर्यंत या
नगरांत राहा.

### स्वर्गारोहण

५० नंतर त्यानें त्यांस बेथानीपर्यंत बाहेर नेलें; आणि
हात वर करून त्यांस आशीर्वाद दिला. ५१ मग असें
झालें कीं तो त्यांस आशीर्वाद देत असतां त्यांज-
पासून वेगळा झाला आणि स्वर्गांत वर घेतला गेला.
५२ तेव्हां ते त्याला नमन करून मोठ्या आनंदानें
यरुशलेमास माघारे गेले; ५३ आणि ते मंदिरांत
देवाचा धन्यवाद नित्य करीत राहिले.

# योहानकृत शुभवर्तमान



### प्रस्तावना

१ प्रारंभीं शब्द होता, शब्द देवासह होता
१ आणि शब्द देव होता. २ तोच प्रारंभीं देवासह होता.
३ त्याच्या द्वारें सर्व झालें; आणि झालें असें कांहींच
त्याजवांचून झालें नाहीं. ४ त्याच्या ठायीं जीवन होतें;
व तें जीवन मनुष्यांचा प्रकाश होतें. ५ तो प्रकाश अंधा-
रांत प्रकाशतो; तरी अंधारानें त्याचें ग्रहण केलें नाहीं.
६ देवानें पाठविलेला एक मनुष्य प्रगट झाला त्याचें नांव
योहान. ७ तो साक्षीकरितां म्हणजे त्या प्रकाशाविषयीं
साक्ष देण्याकरितां आला, यासाठीं कीं त्याच्या द्वारें
सर्वांनीं विश्वास धरावा. ८ तो हा प्रकाश नव्हता, तर त्या
प्रकाशाविषयीं साक्ष देण्याकरितां आलेला होता. ९ जो

खरा प्रकाश प्रत्येक मनुष्याला प्रकाशित करितो तो जगांत
येणार होता. १० तो जगांत होता, व जग त्याच्या द्वारें
झालें, तरी जगानें त्याला ओळखिलें नाहीं. ११ तो
स्वकीयांकडे आला तरी त्याच्या स्वकीयांनीं त्याचा स्वीकार
केला नाहीं. १२ जितक्यांनीं त्याचा स्वीकार केला
तितक्यांस, म्हणजे त्याच्या नामावर विश्वास ठेवणाऱ्यांस,
त्यानें देवाचीं मुलें होण्याचा अधिकार दिला; १३ त्यांचा
जन्म रक्त, अगर देहाची इच्छा, अगर मनुष्याची इच्छा
यापासून झाला नाहीं; तर देवापासून झाला. १४ शब्द
देही झाला; आणि कृपा व सत्य यांनीं परिपूर्ण असून
त्यानें आम्हांमध्यें वस्ती केली; आम्ही त्याचें गौरव पाहिलें
तें गौरव पित्यापासून आलेल्या एकुलत्या एकाचें असावें
असें होतें. १५ त्याविषयीं योहान साक्ष देतो, आणि उच्च
स्वरानें म्हणतो : जो माझ्यामागून येतो, तो माझ्यापुढें
झाला आहे, कारण तो माझ्यापूर्वी होता : असें ज्याविषयीं
मीं सांगितलें तो हाच आहे. १६ त्याच्या पूर्णतेंतून
आपणां सर्वांस मिळालें; कृपेवर कृपा मिळाली. १७
नियमशास्त्र मोशाच्या द्वारें दिलें होतें; कृपा व सत्य
हीं येशू ख्रिस्ताच्या द्वारें आलीं. १८ देवाला कोणीं
कधीं पाहिलें नाहीं; जो एकुलता एक पुत्र पित्याच्या
उराशीं असतो त्यानें त्याला प्रगट केलें.

## बाप्तिस्मा करणाऱ्या योहानानें येशूविषयीं दिलेली साक्ष

१९ पुढें जेव्हां यहूद्यांनीं यरुशलेमाहून याजक व
लेवी यांना योहानाला विचारावयास पाठविलें कीं तूं
कोण आहेस, तेव्हांची त्याची साक्ष हीच आहे. २०
त्यानें पत्करिलें, नाकारिलें नाहीं; मी ख्रिस्त नाहीं
असें पत्करिलें. २१ तेव्हां त्यांनीं त्याला विचारिलें,
तर काय ? तूं एलीया आहेस काय ? तो म्हणाला,
मी नाहीं. तूं तो संदेष्टा आहेस काय ? त्यावर त्यानें
'नाहीं' असें उत्तर दिलें. २२ यावरून ते त्याला
म्हणाले, ज्यांनीं आम्हांस पाठविलें त्यांस आम्हीं उत्तर
द्यावें म्हणून, तूं कोण आहेस, हें सांग; तूं आपणा-
विषयीं काय म्हणतोस ? २३ तो म्हणाला, यशया
संदेष्ट्यानें सांगितल्याप्रमाणें, 'परमेश्वराचा मार्ग नीट
करा, असें अरण्यांत ओरडणाऱ्याची वाणी' मी
आहें. २४ या इसमांना परूश्यांनीं पाठविलें होतें,
२५ त्यांनीं त्याला विचारिलें, तूं ख्रिस्त नाहींस,
एलीया नाहींस व तो संदेष्टाहि नाहींस, तर बाप्तिस्मा
कां करितोस ? २६ योहानानें त्यांस उत्तर दिलें.
मी पाण्यानें बाप्तिस्मा करितों; ज्याला तुम्ही ओळखत
नाहीं असा एक तुम्हांमध्यें उभा आहे; २७ तो
माझ्यामागून येणारा आहे, त्याच्या वाहणेचा बंद
सोडावयास मी योग्य नाहीं. २८ या गोष्टी यार्देनेच्या
पलीकडे बेथानींत, योहान बाप्तिस्मा देत होता तेथें,
झाल्या.

२९ दुसऱ्या दिवशीं त्यानें येशूला आपणाकडे
येतांना पाहून म्हटलें, हा पाहा, जगाचें पाप हरण
करणारा, देवाचा कोकरा ! ३० ज्याविषयीं मीं
सांगितलें कीं, जो माझ्यापुढें झाला आहे, कारण तो
माझ्यापूर्वी होता असा पुरुष माझ्यामागून येत आहे,
तो हाच आहे. ३१ मी त्याला ओळखीत नव्हतों,
तरी त्यानें इस्राएलास प्रगट व्हावें म्हणून मी येऊन
पाण्यानें बाप्तिस्मा करितों. ३२ योहानानें अशी साक्ष
दिली कीं मीं आत्म्याला कबुतरासारखें आकाशांतून
उतरतां पाहिलें आहे; आणि तो त्याजवर राहिला.
३३ मी त्याला ओळखीत नव्हतों; तरी ज्यानें मला
पाण्यानें बाप्तिस्मा करावयास पाठविलें त्यानें मला सांगितलें
होतें कीं ज्या कोणावर आत्मा उतरतांना व राहतांना
पाहशील तोच पवित्र आत्म्यानें बाप्तिस्मा करणारा
आहे. ३४ मीं पाहिलें आहे व साक्ष दिली आहे
कीं हा देवाचा पुत्र आहे.

## बाप्तिस्मा करणाऱ्या योहानाचे शिष्य व येशू

३५ त्यानंतर दुसऱ्या दिवशीं आपल्या शिष्यांतील
दोघांसह योहान पुनः उभा असतां ३६ येशूला चालतांना
न्याहाळून पाहून म्हणाला, हा पाहा, देवाचा कोकरा !
३७ ते दोघे शिष्य त्याचें हें म्हणणें ऐकून येशूच्या मागें
गेले. ३८ तेव्हां येशूनें वळून त्यांस आपल्यामागें येतांना
पाहून म्हटलें, काय शोधितां ? ते म्हणाले, रब्बी,
( म्हणजे गुरुजी, ) आपण कोठें राहतां ? ३९ त्यानें

त्यांस म्हटलें, या, म्हणजे पाहाल. मग त्यांनीं येऊन तो
कोठें राहतो तें पाहिलें. त्या दिवशीं ते त्याच्या येथें राहिले.
तेव्हां सुमारें दहावा तास होता. ४० जे दोघे जण
योहानाचें म्हणणें ऐकून त्याच्यामागें गेले, त्यांत शिमोन
पेत्राचा भाऊ अंद्रिया हा एक होता. ४१ त्याला त्याचा
स्वतःचा भाऊ शिमोन पहिल्यानें भेटला, तेव्हां तो त्याला
म्हणाला, मशीहा (म्हणजे ख्रिस्त) आम्हांस सांपडला
आहे. ४२ त्यानें त्याला येशूकडे आणिलें; येशूनें त्याजकडे
पाहून म्हटलें, तूं योहानाचा पुत्र शिमोन आहेस; तुला
केफा (म्हणजे पेत्र) म्हणतील.

४३ दुसऱ्या दिवशीं त्यानें गालीलांत जाण्याचा
बेत केला, तेव्हां फिलिप्प त्याला भेटला; येशूनें
त्याला म्हटलें, माझ्यामागें ये. ४४ फिलिप्प तर
अंद्रिया व पेत्र यांचें नगर बेथसैदा एथला होता.
४५ फिलिप्पाला नथनेल भेटल्यावर तो त्याला
म्हणाला, ज्याविषयीं मोशानें नियमशास्त्रांत लिहिलें व
संदेष्ट्यांनीं लिहिलें तो, म्हणजे योसेफाचा पुत्र येशू
नासरेथकर, आम्हांस सांपडला आहे. ४६ नथनेलानें
त्याला म्हटलें, नासरेथांतून कांहीं उत्तम निघेल काय?
फिलिप्प त्याला म्हणाला, येऊन पाहा. ४७ येशूनें
नथनेलाला आपणाकडे येतांना पाहून त्याविषयीं
म्हटलें, पाहा, हा खराखुरा इस्राएली आहे, यांत
कपट नाहीं! ४८ नथनेल त्याला म्हणाला, आप-
णाला माझी ओळख कोठली? येशूनें त्याला उत्तर
दिलें, तुला फिलिप्पानें बोलावण्यापूर्वीं तूं अंजिराच्या
झाडाखालीं होतास, तेव्हां मीं तुला पाहिलें.
४९ नथनेलानें त्याला म्हटलें, गुरुजी, आपण
देवाचे पुत्र आहां; आपण इस्राएलाचे राजे
आहां. ५० येशूनें त्याला म्हटलें, मीं तुला
अंजिराच्या झाडाखालीं पाहिलें असें तुला सांगितलें
म्हणून तूं विश्वास धरितोस काय? यांहून मोठ्या
गोष्टी पाहशील. ५१ आणखी तो त्याला म्हणाला,
मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों, आकाश उघडलेलें
आणि देवदूतांस चढतांना व मनुष्याच्या पुत्रावर
उतरतांना तुम्ही पाहाल.

## काना येथील लग्न

१ नंतर तिसऱ्या दिवशीं गालीलांतील काना
२ एथें लग्न होतें; आणि येशूची आई तेथें होती.
२ येशूला व त्याच्या शिष्यांलाहि लग्नाचें आमं-
त्रण होतें; ३ आणि द्राक्षारस सरला तेव्हां येशूची
आई त्याला म्हणाली, त्यांच्याजवळ द्राक्षारस नाहीं.
४ येशूनें तिला म्हटलें, बाई, माझा तुझा काय संबंध?
माझी वेळ अजून आली नाहीं. ५ त्याच्या आईनें
चाकरांस म्हटलें, हा जें कांहीं तुम्हांस सांगेल तें
करा. ६ तेथें पाण्याच्या सहा दगडी कुंड्या, यहू-
द्यांच्या शुद्धीकरणाच्या रीतीप्रमाणें ठेविल्या होत्या;
त्यांत दोनदोन किंवा तीनतीन मण मावतील अशा
त्या होत्या. ७ येशूनें त्यांस म्हटलें, कुंड्या पाण्यानें
भरा, तेव्हां त्या त्यांनीं तोंडोतोंड भरल्या. ८ मग
त्यानें त्यांस सांगितलें, आतां त्यांतून काढून जेवण-
कारभाऱ्याकडे न्या; तेव्हां त्यांनीं तसें नेलें. ९ जेव्हां जेवण-
कारभाऱ्यानें पाण्याचा झालेला द्राक्षारस चाखला, (तो
कोठला आहे हें त्याला ठाऊक नव्हतें, पाणी काढ-
णाऱ्या चाकरांस ठाऊक होतें,) तेव्हां जेवणकार-
भाऱ्यानें वराला बोलावून म्हटलें, १० प्रत्येक मनुष्य
पहिल्यानें चांगला द्राक्षारस वाढितो, आणि लोक यथेच्छ
प्याल्यावर मग नीरस वाढितो; तुम्हीं तर चांगला
द्राक्षारस अजूनपर्यंत ठेविला आहे. ११ येशूनें आपल्या
चिन्हांचा हा प्रारंभ गालीलांतील काना येथें करून
आपलें गौरव प्रगट केलें, आणि त्याच्या शिष्यांनीं
त्याजवर विश्वास ठेविला.

१२ त्यानंतर तो, त्याची आई, त्याचे भाऊ व
त्याचे शिष्य कफर्णहूमास खालीं गेले; परंतु तेथें ते
फार दिवस राहिले नाहींत.

## मंदिराचें शुद्धीकरण

१३ तेव्हां यहूद्यांचा वल्हांडण सण जवळ आला,
व येशू यरुशलेमास वर गेला; १४ आणि मंदिरांत
गुरें, मेंढरें व कबुतरें विकणारे आणि सराफ हे
बसलेले त्याला आढळले. १५ तेव्हां त्यानें दोऱ्यांचा
एक कोरडा करून मेंढरें व गुरें या सर्वांस मंदि-

रांतून घालविलें; सराफांचा खुर्दाहि ओतिला व चौरंग
पालथे केले; १६ आणि कबुतरें विकणाऱ्यांस म्हटलें,
हीं एथून काढा; माझ्या बापाचें घर व्यापाराचें घर
करूं नका. १७ तेव्हां 'तुझ्या मंदिराविषयींचा
आवेश मला ग्रासून टाकील' असें लिहिलेलें अस-
ल्याचें त्याच्या शिष्यांस आठवलें. १८ यहूद्यांनीं त्याला
म्हटलें, आपण हें करितां तर आम्हांस काय चिन्ह
दाखवितां? १९ येशूनें त्यांस उत्तर दिलें, तुम्ही हें
मंदिर मोडा, आणि हें मी तीन दिवसांत उभारीन.
२० यावरून यहूदी म्हणाले, हें मंदिर बांधावयास
शेचाळीस वर्षें लागलीं आणि हें आपण तीन दिवसांत
उभारणार काय? २१ तो तर आपल्या शरीररूपी
मंदिराविषयीं बोलला. २२ यास्तव तो मेलेल्यांमधून
उठल्यावर त्याच्या शिष्यांस, त्यानें असें म्हटलें होतें,
हें आठवलें, आणि त्यांनीं शास्त्रावर व येशूनें जें
वचन सांगितलें होतें त्यावर विश्वास ठेविला.

२३ तो वल्हांडणाच्या सणांत यरुशलेम एथें अस-
तांना त्यानें केलेलीं चिन्हें पाहून पुष्कळ लोकांनीं
त्याच्या नामावर विश्वास ठेविला. २४ येशूला तर सर्वांची
ओळख असल्यामुळें त्यानें स्वतःला त्यांच्या हातीं सोपविलें
नाहीं; २५ आणखी मनुष्याविषयीं कोणी साक्ष द्यावी
याची त्याला गरज नव्हती, कारण मनुष्यांत काय
आहे त्याचें ज्ञान त्याला स्वतःला होतें.

## निकदेमाबरोबर संभाषण

३ १ परूश्यांपैकीं निकदेम नामक एक मनुष्य होता;
तो यहूद्यांचा एक अधिकारी होता. २ तो रात्रीं त्याज-
कडे येऊन त्याला म्हणाला, गुरुजी, आपण देवापासून
आलेले शिक्षक आहां हें आम्हांस ठाऊक आहे; कारण हीं
जीं चिन्हें आपण करितां तीं देव त्याच्याबरोबर असल्या-
वांचून कोणाऱ्यानें करवणार नाहींत. ३ येशूनें त्याला
म्हटलें, मी तुला खचीत खचीत सांगतों, नव्यानें जन्म-
ल्यावांचून कोणालाहि देवाचें राज्य पाहतां येत नाहीं. ४
निकदेम त्याला म्हणाला, म्हातारा झालेला मनुष्य कसा
जन्मेल? त्याच्यानें मातेच्या उदरांत दुसऱ्यानें जाववेल व
जन्म घेववेल काय? ५ येशूनें उत्तर दिलें कीं मी तुला
खचीत खचीत सांगतों, पाण्यापासून व आत्म्यापासून
जन्मल्यावांचून कोणालाहि देवाच्या राज्यांत प्रवेश करितां
येत नाहीं. ६ जें देहापासून जन्मलें तें देह आहे, आणि
जें आत्म्यापासून जन्मलें तें आत्मा आहे. ७ तुम्हांस
नव्यानें जन्मलें पाहिजे हें मीं तुला सांगितलें, म्हणून
आश्चर्य मानूं नको. ८ वारा पाहिजे तिकडे वाहतो, आणि
त्याचा नाद तूं ऐकतोस, तरी तो कोठून येतो व कोठें
जातो हें तुला कळत नाहीं; जो कोणी आत्म्यापासून जन्मला
त्याचें असेंच आहे. ९ निकदेमानें त्याला म्हटलें, या गोष्टी
कशा होतील? १० येशूनें त्याला उत्तर दिलें, तूं इस्राएल
लोकांचा गुरु असून या गोष्टी समजत नाहींस काय? ११
मी तुला खचीत खचीत सांगतों कीं जें आम्हांस ठाऊक
आहे तें आम्ही सांगतों, आणि जें आम्हीं पाहिलें आहे
त्याविषयीं साक्ष देतों; आणि तुम्ही आमची साक्ष मान्य
करीत नाहीं. १२ मीं पृथ्वीवरच्या गोष्टी तुम्हांस सांगितल्या
असतां तुम्ही विश्वास धरीत नाहीं, तर मग स्वर्गातल्या
गोष्टी तुम्हांस सांगितल्यास विश्वास कसा धराल? १३
स्वर्गाहून उतरलेला [ व स्वर्गात असलेला ] मनुष्याचा पुत्र
याजवांचून कोणी स्वर्गी चढून गेला नाहीं. १४ जसा
मोशानें अरण्यांत सर्प उंच केला तसेंच मनुष्याच्या पुत्राला
उंच केलें पाहिजे; १५ यासाठीं कीं जो कोणी विश्वास
ठेवितो त्याला त्याच्या ठायीं सार्वकालिक जीवन
प्राप्त व्हावें.

१६ देवानें जगावर एवढी प्रीति केली कीं त्यानें
आपला एकुलता एक पुत्र दिला, यासाठीं कीं जो कोणी
त्याजवर विश्वास ठेवितो त्याचा नाश होऊं नये तर त्याला
सार्वकालिक जीवन प्राप्त व्हावें. १७ देवानें पुत्राला
जगाचा न्यायनिवाडा करण्यासाठीं नाहीं, तर त्याच्या द्वारें
जगाचें तारण व्हावें म्हणून पाठविलें. १८ जो त्याजवर
विश्वास ठेवितो त्याजवर न्यायनिवाड्याचा प्रसंग येत नाहीं;
जो विश्वास ठेवीत नाहीं त्याचा न्यायनिवाडा झालाच आहे;
कारण त्यानें देवाच्या एकुलत्या एका पुत्राच्या नामावर
विश्वास ठेविला नाहीं. १९ न्यायाचा निवाडा हाच आहे
कीं जगांत प्रकाश आला आहे, आणि मनुष्यांनीं प्रकाशा-
पेक्षां अंधाराची आवड धरिली; कारण त्यांचीं कर्में दुष्ट

होती. २० जो कोणी वाईट कर्में करितो तो प्रकाशाचा द्वेष करितो, आणि आपलीं कर्में सदोष ठरूं नयेत म्हणून प्रकाशाकडे येत नाहीं; २१ परंतु जो सत्य आचरतो तो प्रकाशाकडे येतो; यासाठीं कीं आपलीं कर्में देवाच्या ठायीं केलेलीं आहेत अशीं तीं उघड व्हावीं.

### बाप्तिस्मा करणारा योहान येशूविषयीं आणखी साक्ष देतो

२२ त्यानंतर येशू आणि त्याचे शिष्य यहूदीया प्रांतांत आले; आणि तो तेथें त्यांच्याबरोबर राहून बाप्तिस्मा करीत असे. २३ योहानहि शालिमाजवळचें एनोन येथें बाप्तिस्मा करीत असे, कारण तेथें फार पाणी होतें; आणि लोक येऊन बाप्तिस्मा घेत असत. २४ योहान तोंपर्यंत बंदिशाळेंत पडला नव्हता. २५ योहानाच्या शिष्यांचा एका यहूद्याबरोबर शुद्धीकरणाविषयीं वादविवाद झाला. २६ ते योहानाकडे येऊन त्याला म्हणाले, गुरुजी, पाहा, यार्देनेच्या पलीकडे जो तुझ्याबरोबर होता, ज्याविषयीं तूं साक्ष दिली आहे, तो बाप्तिस्मा करितो; आणि सर्व लोक त्याजकडे जातात. २७ योहानानें उत्तर दिलें, मनुष्याला स्वर्गांतून दिल्यावांचून कांहीं मिळत नाहीं. २८ मी ख्रिस्त नव्हें तर त्याच्यापुढें पाठविलेला आहें, असें मीं म्हटलें, याविषयीं तुम्हीच माझे साक्षी आहां. २९ ज्याला वधू आहे तो वर; आणि वराचा मित्र जो उभें राहून त्याचें भाषण ऐकतो त्याला वराच्या शब्दावरून अति आनंद होतो; असा हा माझा आनंद पूर्ण झाला आहे. ३० त्यांची वृद्धि व्हावी व माझा ऱ्हास व्हावा हें अवश्य आहे.

३१ जो वरून येतो तो सर्वांच्या वर आहे; जो पृथ्वीपासून झाला तो पृथ्वीचा आहे व पृथ्वीच्या गोष्टी बोलतो; जो स्वर्गांतून आला तो सर्वांच्या वर आहे; ३२ जें त्यानें पाहिलें व ऐकलें आहे त्याविषयीं तो साक्ष देतो; आणि त्याची साक्ष कोणी कबूल करीत नाहीं. ३३ ज्यानें त्याची साक्ष कबूल केली आहे त्यानें, देव सत्य आहे, या गोष्टीवर शिक्का केला आहे. ३४ ज्याला देवानें पाठविलें तो देवाचीं वचनें बोलतो; कारण तो आत्मा परिमित असा देत नाहीं. ३५ पिता पुत्रावर प्रीति करितो, आणि त्यानें सर्व त्याच्या हातीं दिलें आहे. ३६ जो पुत्रावर विश्वास ठेवितो त्याला सार्वकालिक जीवन आहे; परंतु जो पुत्राला मानीत नाहीं त्याच्या दृष्टीस जीवन पडणार नाहीं; देवाचा क्रोध बरीक त्याजवर राहतो.

### येशू व शोमरोनी स्त्री

४ १ येशू योहानापेक्षां अधिक शिष्य करून त्यांचा बाप्तिस्मा करीत आहे हें परूश्यांच्या कानीं गेलें असें जेव्हां प्रभूला कळलें, २ (तरी येशू स्वतः बाप्तिस्मा करीत नसे, त्याचे शिष्य करीत असत,) ३ तेव्हां तो यहूदीया सोडून पुनः गालीलांत गेला; ४ आणि त्याला शोमरोनामधून जावें लागलें. ५ मग तो शोमरोनांतील सूखार नामें नगरास आला; तें याकोबानें आपला पुत्र योसेफ यास दिलेल्या शेताजवळ होतें; ६ तेथें याकोबाचा झरा होता. येशू चालतां चालतां दमलेला तसाच त्या झऱ्यावर बसला, तेव्हां सुमारें सहावा तास होता. ७ तेथें शोमरोनाची एक स्त्री पाणी काढावयास आली. तिला येशू म्हणाला, मला प्यावयाला पाणी दे. ८ त्याचे शिष्य अन्न विकत घ्यावयास नगरांत गेले होते. ९ तेव्हां ती शोमरोनी स्त्री त्याला म्हणाली, आपण यहूदी असतां मजसारख्या शोमरोनी स्त्रीजवळ प्यावयाला पाणी कसें मागतां? (कारण यहूदी शोमरोन्यांबरोबर व्यवहार करीत नसतात,) १० येशूनें तिला उत्तर दिलें कीं देवाचें दान म्हणजे काय आणि मला प्यावयाला पाणी दे असें तुला म्हणणारा कोण, हें तुला कळलें असतें तर तूं त्याजजवळ मागितलें असतें, आणि त्यानें तुला जीवंत पाणी दिलें असतें. ११ ती त्याला म्हणाली, महाराज, पाणी काढावयास आपणाजवळ पोहरा नाहीं व विहीर खोल आहे; तर तें जीवंत पाणी आपणाजवळ कोठून? १२ आमचा पूर्वज याकोब यानें ही विहीर आम्हांस दिली; तो स्वतः, त्याचे पुत्र व त्याचीं गुरेंढोरें हिचें पाणी पीत असत, त्यापेक्षां आपण मोठे आहांत काय? १३ येशूनें तिला उत्तर दिलें,

जो कोणी हें पाणी पिईल त्याला पुनः तहान लागेल;
१४ परंतु मी देईन तें पाणी जो कोणी पिईल त्याला कधीं
तहान लागणार नाहीं; जें पाणी मी त्याला देईन तें
त्याजमध्यें सार्वकालिक जीवनासाठीं उपळत्या पाण्याचा झरा
असें होईल. १५ ती स्त्री त्याला म्हणाली, महाराज, मला
तहान लागूं नये व मला पाणी काढावयास एथवर येण्याचें
पडूं नये म्हणून तें पाणी मला द्यावें. १६ तो तिला
म्हणाला, तूं जाऊन आपल्या नवऱ्याला बोलाव आणि इकडे
ये. १७ ती स्त्री म्हणाली, मला नवरा नाहीं. येशूनें तिला
म्हटलें, मला नवरा नाहीं हें ठीक बोललीस, १८ कारण
तुला पांच नवरे होते; आणि आतां जो तुला आहे तो तुझा
नवरा नाहीं, हें तूं खरें म्हटलेंस. १९ ती स्त्री त्याला
म्हणाली, महाराज, आपण संदेष्टे आहांत हें मला
आतां समजलें. २० आमच्या पूर्वजांनीं याच डोंगरावर
उपासना केली; आणि तुम्ही म्हणतां, उपासना ज्या
स्थानीं केली पाहिजे तें स्थान यरुशलेमांत आहे.
२१ येशूनें तिला म्हटलें, बाई, तुम्ही पित्याची
उपासना या डोंगरावर व यरुशलेमांतहि करणार
नाहीं अशी वेळ येत आहे, हें माझें खरें मान.
२२ तुम्हांस ठाऊक नाहीं अशाची उपासना तुम्ही
करितां; आम्हांस ठाऊक आहे अशाची उपासना
आम्ही करितों; कारण यहूद्यांतूनच तारण आहे; २३
तरी खरे उपासक आत्म्यानें व खरेपणानें पित्याची
उपासना करितील अशी वेळ येत आहे, किंबहुना
आलीच आहे; कारण असे आपले उपासक असावे
अशी पित्याची इच्छा आहे. २४ देव आत्मा आहे;
आणि त्याच्या उपासकांनीं त्याची उपासना आत्म्यानें
व खरेपणानें केली पाहिजे. २५ ती स्त्री त्याला
म्हणाली, मशीहा ( म्हणजे ख्रिस्त ) येणार आहे हें
मला ठाऊक आहे; तो आल्यावर आम्हांस सर्व
गोष्टी सांगेल. २६ येशूनें तिला म्हटलें, जो तुजबरो-
बर बोलत आहे तो मी तोच आहें.

२७ इतक्यांत त्याचे शिष्य आले; आणि तो
एका स्त्रीबरोबर बोलत आहे याचें त्यांस आश्चर्य
वाटलें; तरी आपण काय विचारतां किंवा तिजबरोबर
कां बोलतां असें त्याला कोणीं म्हटलें नाहीं. २८ ती
स्त्री तर आपली घागर टाकून व नगरांत जाऊन
लोकांस म्हणूं लागली, २९ चला, मीं केलेलें सर्व ज्यानें
मला सांगितलें त्या मनुष्याला पाहा; तोच ख्रिस्त
असेल काय ? ३० तेव्हां ते नगरांतून निघून त्याजकडे
येऊं लागले. ३१ या अवकाशांत शिष्यांनीं त्याला
विनंति केली कीं गुरुजी, जेवावें; ३२ परंतु तो
त्यांस म्हणाला, तुम्हांस ठाऊक नाहीं असें अन्न मज-
जवळ खावयाला आहे. ३३ यावरून शिष्य एकमे-
कांस म्हणाले, याला कोणीं खावयाला आणिलें असेल
काय ? ३४ येशू त्यांस म्हणाला, ज्यानें मला पाठ-
विलें त्याच्या इच्छेप्रमाणें करावें व त्याचें कार्य सिद्धीस
न्यावें हेंच माझें अन्न आहे. ३५ चार महिन्यांचा
अवकाश आहे, मग कापणी येईल असें तुम्ही म्हणतां
कीं नाहीं ? पाहा, मी तुम्हांस म्हणतों, आपले डोळे
वर करून शेतें पाहा; तीं कापणीसाठीं पांढरीं होऊन
चुकलीं आहेत. ३६ कापणारा मजुरी मिळवीत आहे
व सार्वकालिक जीवनासाठीं पीक एकवट करीत आहे;
यासाठीं कीं पेरणाऱ्यानें व कापणाऱ्यानेंहि एकत्र आनंद
करावा. ३७ एक पेरितो व एक कापितो, अशी
जी म्हण आहे ती याविषयीं खरी आहे. ३८
ज्यासाठीं तुम्हीं श्रम केले नाहींत तें कापावयाला मीं
तुम्हांस पाठविलें; दुसऱ्यांनीं श्रम केले आहेत व
त्यांच्या श्रमांचे विभागी तुम्ही झालां आहां.

३९ मीं केलेलें सर्व त्यानें मला सांगितलें, अशी
साक्ष देणाऱ्या त्या स्त्रीच्या बोलण्यावरून त्या नगरां-
तील पुष्कळ शोमरोन्यांनीं त्याजवर विश्वास ठेविला; ४०
आणि म्हणून शोमरोनी त्याजकडे आल्यावर त्यांनीं त्याला,
आपण आमच्या एथें मुकाम करावा, अशी विनंति केली;
मग तो तेथें दोन दिवस राहिला. ४१ त्याच्या वचना-
वरून आणखी किती तरी लोकांनीं विश्वास धरिला; ४२
आणि ते त्या स्त्रीला म्हणाले, आतां तुझ्या बोलण्या-
वरूनच आम्ही विश्वास धरितों असें नाहीं, कारण आम्हीं
स्वतः श्रवण केलें असून हा खचीत जगाचा तारणारा आहे
हें ओळखलें आहे.

### येशू राजाच्या अमलदाराच्या मुलाला गालीलामध्यें बरें करतो

४३ मग त्या दोन दिवसांनंतर तो तेथून निघून गालीलांत गेला. ४४ कारण येशूनें स्वत: साक्ष दिली कीं संदेष्टा स्वदेशांत सन्मान पावत नाहीं. ४५ तो गालीलांत आल्यावर गालीलकरांनीं त्याचा स्वीकार केला, कारण यरुशलेमामध्यें सणांत जें कांहीं त्यानें केलें तें सर्व त्यांनीं पाहिलें होतें, आणि तेहि सणास गेले होते.

४६ नंतर तो गालीलांतील काना येथें पुन: आला; तेथें त्यानें पाण्याचा द्राक्षारस केला होता. त्या स्थळीं राजाचा कोणी एक अमलदार होता, त्याचा मुलगा कफर्णहूमांत आजारी होता. ४७ येशू यहूदीयांतून गालीलांत आला आहे असें ऐकून तो त्याजकडे गेला, आणि आपण खालीं येऊन माझ्या मुलाला बरें करावें अशी त्यानें त्याला विनंति केली; कारण तो मरणाच्या पंथास लागला होता. ४८ त्यावर येशूनें त्याला म्हटलें, तुम्ही चिन्हें व उत्पात पाहिल्यावांचून विश्वास ठेवणारच नाहीं. ४९ तो अमलदार त्याला म्हणाला, महाराज, माझें मूल मरण पावण्यापूर्वीं आपण खालीं येण्याचें करावें. ५० येशूनें त्याला म्हटलें, जा, तुझा मुलगा वांचला आहे. तो मनुष्य, येशूनें त्याला सांगितलेल्या वचनावर विश्वास ठेवून, चालता झाला; ५१ आणि तो खालीं जात असतां त्याचे दास त्याला भेटून म्हणाले, तुझा मुलगा वांचला आहे. ५२ यावरून त्याला कोणत्या ताशीं उतार पडूं लागला, हें त्यानें त्यांस विचारिलें; त्यांनीं त्याला म्हटलें, काल सातव्या ताशीं त्याचा ताप गेला. ५३ यावरून ज्या ताशीं येशूनें त्याला सांगितलें कीं तुझा मुलगा वांचला आहे, त्याच ताशीं हें झालें असें बापानें ओळखलें, आणि स्वतः त्यानें व त्याच्या सर्व घराण्यानें विश्वास ठेविला. ५४ येशूनें यहूदीयांतून गालीलांत आल्यावर पुन: जें दुसरें चिन्ह केलें तें हेंच.

### बेथेसदा तळ्याजवळचा पंगू मनुष्य

१ त्यानंतर यहूद्यांचा सण होता, तेव्हां येशू
५ यरुशलेमास वर गेला.

२ यरुशलेमांत मेंढरें दरवाजाजवळ एक तळें आहे, त्याला इब्री भाषेंत बेथेसदा म्हणतात; त्याजवळ पांच पडव्या आहेत. ३ त्यांमध्यें रोगी, अंधळे, लंगडे, लुले यांचा मोठा समुदाय पडलेला असे; [ तो पाणी हालण्याची वाट पाहत असे; ४ कारण कीं देवदूत वेळोवेळीं तळ्यांत उतरून पाणी हालवीत असे, आणि पाणी हालविल्यानंतर प्रथम जो त्यांत जाई त्याला कोणताहि रोग असला तरी तो बरा होत असे. ] ५ तेथें अडतीस वर्षें दुखणेकरी असलेला कोणीएक मनुष्य होता. ६ येशूनें त्यास पडलेलें पाहिलें, आणि त्याला तसें होऊन आतां बहुत काळ लोटला आहे हें ओळखून त्याला म्हटलें, तुला बरें होण्याची इच्छा आहे काय? ७ त्या दुखणेकऱ्यानें त्याला उत्तर दिलें, महाराज, पाणी उसळलें असतां मला तळ्यांत सोडावयास माझा कोणी मनुष्य नाहीं; आणि मी जात आहें इतक्यांत दुसरा कोणी माझ्यापुढें उतरतो. ८ येशूनें त्याला म्हटलें, ऊठ, आपली बाज उचलून चालावयाला लाग. ९ तेव्हां तो मनुष्य तत्काळ बरा झाला व आपली बाज उचलून चालूं लागला.

१० त्या दिवशीं शब्बाथ होता; यावरून यहूदी बरें झालेल्या त्या मनुष्याला म्हणाले, आज शब्बाथ आहे, बाज उचलणें तुला योग्य नाहीं. ११ त्यानें त्यांस उत्तर दिलें, ज्यानें मला बरें केलें त्यानेंच मला सांगितलें कीं आपली बाज उचलून चाल. १२ त्यांनीं त्याला विचारिलें, आपली बाज उचलून चाल, असें ज्यानें तुला सांगितलें तो मनुष्य कोण आहे? १३ तो कोण आहे हें बरें झालेल्या त्या मनुष्याला ठाऊक नव्हतें; कारण त्या ठिकाणीं लोकसमुदाय असल्यामुळें येशू निसटून गेला होता. १४ त्यानंतर येशूनें त्याला मंदिरांत गांठून म्हटलें, पाहा, तूं बरा झाला आहेस; आतांपासून पाप करूं नको; करशील तर तुझें पूर्वीपेक्षां अधिक वाईट होईल. १५ त्या मनुष्यानें जाऊन यहूद्यांस सांगितलें, ज्यानें मला बरें केलें तो येशू आहे. १६ यामुळें यहूदी येशूच्या पाठीस लागले, कारण तो शब्बाथ दिवशीं अशीं कामें करीत असे. १७ येशूनें त्यांस उत्तर

दिलें, माझा पिता आजपर्यंत काम करीत आहे
आणि मीहि काम करीत आहें. १८ यामुळें तर
यहूद्यांनीं त्याला जिवें मारावयाची अधिकच खटपट
केली; कारण त्यानें शब्बाथ मोडिला इतकेंच नाहीं,
तर देवाला आपला पिता म्हणून स्वतःला देवासमान
केलें.

## स्वर्गीय पित्यावर येशू कसा अवलंबून राहतो याचा त्यानें केलेला खुलासा

१९ यावरून येशूनें त्यांस उत्तर दिलें, मी तुम्हांस
खचीत खचीत सांगतों, पुत्र जें कांहीं पित्याला करि-
तांना पाहतो त्यावांचून त्याला स्वतः होऊन कांहीं करितां
येत नाहीं; कारण जें कांहीं तो करितो तें पुत्रहि तसेंच
करितो. २० पिता पुत्रावर प्रीति करितो, आणि आपण
जें कांहीं करितों तें सर्व त्याला दाखवितो; तुम्हांस आश्चर्य
वाटावें म्हणून तो यांहून मोठीं कामें त्याला दाखवील.
२१ जसा पिता मेलेल्यांस उठवून जीवंत करितो तसा
पुत्रहि पाहिजे त्यांस जीवंत करितो. २२ पिता कोणाचाहि
न्याय करीत नाहीं, तर सर्व न्याय करण्याचें काम त्यानें
पुत्राकडे सोपून दिलें आहे; २३ यासाठीं कीं जसा
पित्याचा सन्मान करितात तसा पुत्राचाहि सन्मान
सर्वांनीं करावा. जो पुत्राचा सन्मान करीत नाहीं तो,
ज्यानें मला पाठविलें, त्या पित्याचा सन्मान करीत नाहीं.
२४ मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों, जो माझें वचन
ऐकतो आणि ज्यानें मला पाठविलें त्याजवर विश्वास
ठेवतो त्याला सार्वकालिक जीवन प्राप्त झालें आहे; आणि
त्यावर न्यायाचा प्रसंग येणार नाहीं, तो मरणांतून जीवनांत
पार गेला आहे. २५ मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों,
असा समय येत आहे, किंबहुना आतां आला आहे कीं,
त्यांत मेलेले लोक देवाच्या पुत्राची वाणी ऐकतील; व जे
ऐकतील ते जीवंत होतील. २६ कारण पित्याच्या ठायीं
असें स्वतःचें जीवन आहे तसें पुत्राच्या ठायींहि स्वतःचें
जीवन असावें असें त्यानें त्याला दिलें; २७ आणि तो
मनुष्याचा पुत्र आहे, यास्तव न्यायनिवाडा करण्याचा
अधिकार त्याला दिला. २८ याविषयीं आश्चर्य करूं नका;
कारण असा समय येत आहे कीं, त्यांत कबरेंतलीं सर्व
मनुष्यें त्याची वाणी ऐकतील; २९ ज्यांनीं सत्कर्में केलीं ते
जीवनाच्या पुनरुत्थानासाठीं, आणि ज्यांनीं दुष्कर्में केलीं ते
न्यायाच्या पुनरुत्थानासाठीं बाहेर येतील.

## येशूविषयीं देण्यांत आलेली साक्ष

३० माझ्यानें स्वतः होऊन कांहीं करवत नाहीं; जसें मी
ऐकतों, तसा न्यायनिवाडा करितों; आणि माझा न्याय-
निवाडा यथार्थ आहे; कारण मी आपली इच्छा नव्हे तर
ज्यानें मला पाठविलें त्याच्या इच्छेप्रमाणें करावयाला
पाहतों. ३१ मी आपणाविषयीं साक्ष देतों तर माझी साक्ष
खरी नाहीं. ३२ मजविषयीं साक्ष देणारा दुसरा आहे;
आणि जी साक्ष तो मजविषयीं देतो ती खरी आहे हें
मला ठाऊक आहे. ३३ तुम्ही योहानाकडे साक्षीसाठीं
पाठविलें व त्यानें वस्तुस्थितीविषयीं साक्ष दिली. ३४ मज-
विषयींची जी मनुष्याची साक्ष ती मला नको; तथापि
तुम्हांला तारण प्राप्त व्हावें म्हणून हें सांगितलें. ३५ तो
प्रदीप्त झालेला व प्रकाश देणारा दीप होता, आणि तुम्ही
त्याच्या प्रकाशांत कांहीं वेळ आनंद करावयास मान्य
झालां; ३६ परंतु मला जी साक्ष आहे ती योहानाच्या
साक्षीपेक्षां मोठी आहे; कारण जीं कार्यें सिद्धीस
नेण्याचें पित्यानें मजकडे सोपविलें आहे, म्हणजे जीं
कार्यें मी करितों तींच मजविषयीं साक्ष देतात कीं पित्यानें
मला पाठविलें आहे. ३७ आणखी ज्या पित्यानें मला
पाठविलें त्यानेंच मजविषयीं साक्ष दिली आहे. तुम्हीं
त्याची वाणी कधींहि ऐकली नाहीं, व त्याचें स्वरूपहि
पाहिलें नाहीं. ३८ त्याचें वचन तुम्हांमध्यें तुम्हीं राखिलें
नाहीं; कारण ज्याला त्यानें पाठविलें त्याचें तुम्ही
खरें मानीत नाहीं. ३९ तुम्ही शास्त्रलेख शोधून पाहतां;
कारण त्यांत सार्वकालिक जीवन आपणांस प्राप्त होईल
असें तुम्ही समजतां; तेच मजविषयीं साक्ष देणारे आहेत;
४० तरी जीवनप्राप्ति व्हावी म्हणून मजकडे येण्याची
तुमची इच्छा नाहीं. ४१ मी मनुष्यांच्या हातून मान
करून घेत नाहीं. ४२ तरी तुमच्या ठायीं देवावरची प्रीति
नाहीं हें तुम्हांसंबंधानें मला माहीत आहे; ४३ मी जो
आपल्या पित्याच्या नामानें आलों, त्या माझा स्वीकार
तुम्ही करीत नाहीं; दुसरा कोणी स्वतःच्या नामानें आला

तर त्यांचा स्वीकार कराल. ४४ जे तुम्ही एकमेकांपासून
मान घेतां आणि एकच जो देव त्याकडला मान मिळवि-
ण्याची खटपट करीत नाहीं तें तुम्ही विश्वास कसा धराल ?
४५ मी पित्यासमोर तुम्हांवर दोष ठेवीन असें समजूं
नका; तुम्हांवर दोष ठेवणारा असा एक आहे, म्हणजे ज्या
मोशावर तुम्हीं आशा ठेविली आहे तो. ४६ तुम्हीं मोशाचा
विश्वास धरिला असता तर माझा विश्वास धरिला असता;
कारण मजविषयीं त्यानें लिहिलें; ४७ तुम्ही त्याच्या
लेखांचा विश्वास धरीत नाहीं, तर माझ्या वचनांचा विश्वास
कसा धराल ?

### पांच हजारांना जेवूं घालणें

६ १ त्यानंतर येशू गालीलाच्या, म्हणजे तिबिर्या
समुद्राच्या पलीकडे गेला; २ तेव्हां पुष्कळ लोकसमुदाय
त्याच्यामागून चालला, कारण दुखणाइतांसंबंधानें जीं
चिन्हें तो करीत असे तीं त्यांनीं पाहिलीं होतीं. ३ येशू
डोंगरावर जाऊन तेथें आपल्या शिष्यांसह बसला. ४
यहूद्यांचा वल्हांडण सण जवळ आला होता, ५ तेव्हां
येशूनें दृष्टि वर करून व मोठा लोकसमुदाय आपणाकडे
येत आहे असें पाहून फिलिप्पाला म्हटलें, यांस खावयाला
आपण भाकरी कोठून विकत आणाव्या ? ६ हें तर त्यानें
त्याची परीक्षा पाहण्याकरितां म्हटलें; आपण काय करणार
हें त्याला ठाऊक होतें. ७ फिलिप्पानें त्याला उत्तर दिलें,
यांच्यांतील एकेकानें थोडें थोडें घेतलें तरी पन्नास रुपयांच्या
भाकरी पुरणार नाहींत. ८ त्याच्या शिष्यांतील एक जण,
म्हणजे शिमोन पेत्राचा भाऊ अंद्रिया, त्याला म्हणाला, ९
एथें एक मुलगा आहे, त्याच्याजवळ जवाच्या पांच भाकरी
व दोन मासळ्या आहेत; परंतु त्या इतक्यांस कशा पुरणार ?
१० येशू म्हणाला, लोकांस बसवा. त्या ठिकाणीं पुष्कळ
गवत होतें; तेथें बसणाऱ्या पुरुषांची संख्या सुमारें पांच
हजार होती. ११ येशूनें त्या भाकरी घेतल्या; आणि
ईशोपकारस्मरण केल्यावर बसलेल्यांस वांटून दिल्या; तसेंच
त्या मासळ्यांतूनहि त्यांस पाहिजे तितकें दिलें. १२ ते तृप्त
झाल्यावर त्यानें आपल्या शिष्यांस सांगितलें; कांहीं फुकट
जाऊं नये म्हणून उरलेले तुकडे गोळा करा; १३ मग
जेवणाऱ्यांस पुरें झाल्यावर जवाच्या पांच भाकरींपैकीं
उरलेले तुकडे त्यांनीं गोळा केले; त्या तुकड्यांनीं बारा
टोपल्या भरल्या. १४ त्यानें केलेलें चिन्ह पाहून त्या
मनुष्यांनीं म्हटलें, जगांत येणारा जो संदेष्टा तो खरोखर
हाच आहे.

### येशूचा एकांतवास व त्याचें पाण्यावरून चालणें

१५ मग ते येऊन आपणास राजा करण्याकरितां धरूं
पाहत आहेत हें ओळखून येशू पुनः डोंगरावर एकटाच
निघून गेला.

१६ संध्याकाळ झाल्यावर त्याचे शिष्य खालीं समुद्राकडे
गेले; १७ आणि मचव्यांत बसून समुद्राच्या पलीकडे
कफर्णहूमास चालले; इतक्यांत अंधार पडला, तोंवर येशू
त्यांच्याजवळ आला नव्हता; १८ आणि मोठा वारा सुटून
समुद्र खवळूं लागला होता. १९ मग सुमारें कोस सवा
कोस वल्हवून गेल्यावर त्यांनीं येशूला समुद्रावरून चालून
मचव्याजवळ येतांना पाहिलें; आणि त्यांना भय वाटलें;
२० परंतु तो त्यांस म्हणाला, मी आहें, भिऊं नका. २१
यास्तव त्याला मचव्यावर घेण्याची त्यांस इच्छा झाली;
इतक्यांत त्यांस जावयाचें होतें त्या ठिकाणीं मचवा
किनाऱ्यास पोहंचला.

### लोक चिन्ह मागतात

२२ दुसऱ्या दिवशीं जो लोकसमुदाय समुद्राच्या
पलीकडे उभा होता त्यानें पाहिलें कीं ज्या एका मचव्यांत
त्याचे शिष्य बसले होते त्यावांचून तेथें दुसरा मचवा
नव्हता, आणि येशू आपल्या शिष्यांबरोबर त्या मचव्यांत
बसला नव्हता, तर त्याचे शिष्यच मात्र निघून गेले होते;
२३ ( तरी जेथें प्रभूनें ईशोपकारस्मरण केल्यावर त्यांनीं
भाकर खाल्ली त्या ठिकाणाजवळ तिबिर्यापासून दुसरे मचवे
आले होते; ) २४ तेथें येशू नाहीं व त्याचे शिष्यहि
नाहींत असें लोकसमुदायानें पाहिलें, तेव्हां ते मचव्यांत
बसून येशूचा शोध करीत कफर्णहूमास आले. २५ तेव्हां
तो त्यांस समुद्राच्या पलीकडे भेटल्यावर ते त्याला म्हणाले,
गुरुजी, एथें कधीं आलां ? २६ येशूनें त्यांस उत्तर दिलें,
मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों, तुम्हीं चिन्हें पाहिलीं
म्हणून नाहीं, तर भाकरी खाऊन तृप्त झालां म्हणून माझा
शोध करितां. २७ नाशवंत अन्नासाठीं श्रम करूं नका, तर

सार्वकालिक जीवनासाठीं टिकणारें जें अन्न मनुष्याचा पुत्र
तुम्हांस देईल, त्यासाठीं श्रम करा; कारण पिता जो देव
यानें त्याजवर शिक्का मारिला आहे. २८ यावरून त्यांनीं
याला म्हटलें, देवाचीं कामें आमच्या हातून व्हावीं म्हणून
आम्हीं काय करावें? २९ येशूनें त्यांस उत्तर दिलें, देवाचें
काम हेंच आहे कीं ज्याला त्यानें पाठविलें त्याजवर तुम्हीं
विश्वास ठेवावा. ३० यावरून त्यांनीं त्याला म्हटलें, आम्हीं
जें पाहून आपणावर विश्वास ठेवावा असें चिन्ह आपण
कोणतें दाखवितां? आपण काय काम करितां? ३१
आमच्या पूर्वजांनीं अरण्यांत मान्ना खाल्ला; असें लिहिलें
आहे कीं 'त्यानें त्यांस स्वर्गांतून भाकर खावयाला दिली.'
३२ यावरून येशूनें त्यांस म्हटलें, मी तुम्हांस खचीत
खचीत सांगतों, मोशानें तुम्हांस स्वर्गांतून येणारी भाकर
दिली असें नाहीं, माझा पिता तर स्वर्गांतून येणारी खरी
भाकर तुम्हांस देतो. ३३ कारण जी स्वर्गांतून उतरते व
जगाला जीवन देते ती देवाची भाकर होय. ३४ यास्तव
ते त्याला म्हणाले, प्रभुजी, ही भाकर आम्हांस नित्य द्यावी.
३५ येशूनें त्यांस म्हटलें, जीवनाची भाकर मी आहें; जो
मजकडे येतो त्याला भूक लागणार नाहीं. ३६ आणि जो
मजवर विश्वास ठेवितो त्याला कधींहि तहान लागणार नाहीं;
परंतु तुम्हीं मला पाहिलें असतांहि विश्वास ठेवीत नाहीं,
असें मीं तुम्हांस सांगितलें. ३७ पिता जें मला देतो तें
सर्व मजकडे येईल; आणि जो मजकडे येतो त्याला मी
घालविणार नाहींच. ३८ कारण मीं आपल्या इच्छेप्रमाणें
नाहीं, तर ज्यानें मला पाठविलें त्याच्या इच्छेप्रमाणें करावें
म्हणून स्वर्गांतून उतरलों आहें; ३९ आणि ज्यानें मला
पाठविलें त्याची इच्छा हीच आहे कीं त्यानें जें सर्व मला
दिलें आहे त्यांतून मीं कांहीं हरवूं नये, तर शेवटल्या दिवशीं
मीं तें उठवावें. ४० माझ्या पित्याची इच्छा हीच आहे
कीं जो कोणी पुत्राला पाहून त्याजवर विश्वास ठेवितो
त्याला सार्वकालिक जीवन प्राप्त व्हावें; त्याला शेवटल्या
दिवशीं मी उठवीन.

४१ मी स्वर्गांतून उतरलेली भाकर आहें असें तो
म्हणाला, म्हणून यहूदी त्याजविषयीं कुरकूर करूं लागले.
४२ त्यांनीं म्हटलें, योसेफाचा पुत्र येशू, ज्याचीं आईबापें
आपल्याला ठाऊक आहेत, तोच हा आहे ना? तर तो
आतां कसें म्हणतो कीं मी स्वर्गांतून उतरलों आहें?
४३ येशूनें त्यांस उत्तर दिलें, तुम्ही आपसांत कुरकूर करूं
नका. ४४ ज्यानें मला पाठविलें त्या पित्यानें आकर्षिल्या-
वांचून कोणाच्यानें मजकडे येववत नाहीं; त्याला शेवटल्या
दिवशीं मी उठवीन. ४५ संदेष्टयांच्या ग्रंथांत असें
लिहिलें आहे कीं 'ते सर्व देवानें शिकविलेले असे
होतील.' जो कोणी पित्याचें ऐकून शिकला आहे
तो मजकडे येतो. ४६ पित्याला कोणीं पाहिलें आहे
असें नाहीं; जो देवापासून आहे त्यानें मात्र पित्याला
पाहिलें आहे. ४७ मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों,
जो विश्वास धरितो त्याला सार्वकालिक जीवन आहे.
४८ मी जीवनाची भाकर आहें. ४९ तुमच्या
पूर्वजांनीं अरण्यांत मान्ना खाल्ला तरी ते मेले. ५०
स्वर्गांतून उतरणारी भाकर अशी आहे कीं ती कोणीं
खाल्ली तर तो मरणार नाहीं. ५१ स्वर्गांतून उतरलेली
जीवंत भाकर मी आहें; या भाकरींतून जो कोणी
खाईल तो सर्वकाळ वांचेल; जी भाकर मी देईन
ती जगाच्या जीवनासाठीं माझा देह अशी आहे.

५२ यास्तव यहूदी आपसांमध्यें वितंडवाद करूं
लागून म्हणाले, हा आम्हांस आपला देह खावयाला
कसा देईल? ५३ यावरून येशूनें त्यांस म्हटलें, मी
तुम्हांस खचीत खचीत सांगतों, तुम्हीं मनुष्याच्या
पुत्राचा देह खाल्ला नाहीं व त्याचें रक्त प्यालां
नाहीं तर तुम्हांमध्यें जीवन नाहीं; ५४ जो माझा
देह खातो व माझें रक्त पितो त्याला सार्वकालिक
जीवन आहे; त्याला शेवटल्या दिवशीं मी उठवीन.
५५ कारण माझा देह खरें खाद्य आहे व माझें
रक्त खरें पेय आहे. ५६ जो माझा देह खातो व
माझें रक्त पितो तो मजमध्यें राहतो व मी त्याजमध्यें
राहतों. ५७ जसें जीवंत अशा पित्यानें मला पाठ-
विलें आणि मी पित्यामुळें वांचतों, तसें जो मला
खातो तोहि मजमुळें वांचेल. ५८ स्वर्गांतून उतरलेली
जी भाकर ती हीच आहे; पूर्वज खाऊनसवरून
मेले, तसें हें नाहीं; जो ही भाकर खातो तो सर्व-.

काळ वांचेल. ५९ तो कफर्णहूमांत शिक्षण देत
असतां त्यानें सभास्थानांत या गोष्टी सांगितल्या.

६० त्याच्या शिष्यांपैकीं पुष्कळ जणांनीं हें ऐकून
म्हटलें, हें वचन कठीण आहे, हें कोणाच्यानें
ऐकवेल ? ६१ आपले शिष्य याविषयीं कुरकूर करीत
आहेत हें मनांत ओळखून येशू त्यांस म्हणाला,
तुम्ही यामुळें अडखळतां काय ? ६२ मनुष्याचा पुत्र
पूर्वी जेथें होता तेथें जर तुम्ही त्याला चढतांना
पाहाल तर ? ६३ जीवंत करणारा तो आत्माच आहे,
देहापासून कांहीं लाभ होत नाहीं; मीं जीं वचनें
तुम्हांस सांगितलीं आहेत तीं आत्मा व जीवन
आहेत; ६४ तरी तुम्हांपैकीं असे कित्येक आहेत कीं
ते विश्वास धरीत नाहींत. विश्वास न धरणारे कोण
आणि आपणाला धरून देणारा कोण हें येशूला पहिल्या-
पासून ठाऊक होतें. ६५ मग तो म्हणाला,
यासाठींच मीं तुम्हांस सांगितलें आहे कीं माझ्या
पित्यापासून कोणाहि मनुष्याला ही देणगी मिळाल्या-
वांचून त्याच्यानें मजकडे येववत नाहीं.

६६ यावरून त्याच्या शिष्यांतील पुष्कळ जण परत
गेले, ते पुनः कधीं त्याजबरोबर चालले नाहींत.
६७ यास्तव येशू बारा शिष्यांस म्हणाला, तुम्हांलाहि
निघून जाण्याची इच्छा आहे काय ? ६८ शिमोन
पेत्रानें त्याला उत्तर दिलें, प्रभुजी, आम्हीं कोणाकडे
जावें ? सार्वकालिक जीवनाचीं वचनें आपणाजवळच
आहेत; ६९ आणि आपण देवाचे पवित्र पुत्र आहां,
असा आम्हीं विश्वास धरिला आहे व ओळखलें आहे.
७० येशूनें त्यांस उत्तर दिलें कीं मीं तुम्हां बारा
जणांस निवडून घेतलें कीं नाहीं ? तरी तुम्हांतील एक
जण सैतान आहे. ७१ हें तो शिमोन इस्कर्योत
याचा पुत्र यहूदा याविषयीं बोलला, कारण तो बारा
शिष्यांतील एक असून त्याला धरून देणार होता.

## येशू आणि त्याचे बंधु

**७** १ यानंतर येशू गालीलांत फिरला; यहूदी
त्याला जिवें मारावयास पाहत होते, म्हणून त्याला
यहूदीयांत फिरावेंसें वाटलें नाहीं. २ यहूद्यांचा
सण म्हणजे मंडपांचा सण जवळ आला होता; ३
यास्तव त्याचे भाऊ त्याला म्हणाले, तूं एथून निघून
यहूदीयांत जा, म्हणजे जीं कामें तूं करितोस तीं
तुझ्या शिष्यांनींहि पाहावीं. ४ जो कोणी प्रसिद्ध
होऊं पाहतो तो गुप्तपणें कांहीं करीत नाहीं; तूं
हीं कामें करितोस तर स्वतः जगाला प्रगट हो. ५
त्याच्या भावांनींहि त्याजवर विश्वास ठेविला नव्हता.
६ त्यावरून येशू त्यांस म्हणाला, माझा समय अजून
आला नाहीं, तुमचा समय तर सर्वदा सिद्ध आहे.
७ जगानें तुमचा द्वेष करावा असें होत नाहीं; तें
माझा द्वेष करतें, कारण त्याचीं कामें वाईट आहेत
अशी मी त्याविषयीं साक्ष देतों. ८ तुम्ही सणास वर
जा; माझा समय अजून पूर्ण झाला नाहीं, म्हणून
मी आतांच या सणास जात नाहीं. ९ असें त्यांस
सांगून तो गालीलांत राहिला.

१० त्याचे भाऊ सणास गेल्यानंतर तोहि प्रसिद्ध-
पणें नाहीं, तर गुप्तपणें वर गेला. ११ यावरून तो
कोठें आहे, असें म्हणत यहूदी त्याचा त्या सणांत
शोध करूं लागले. १२ लोकसमुदायांतहि त्याजविषयीं
फार कुजबूज चालू झाली; कोणी म्हणाले, तो चांगला
मनुष्य आहे; कोणी म्हणाले, नाहीं, तो लोकांस
फसवितो; १३ तरी यहूद्यांच्या भीतीमुळें त्याजविषयीं
कोणी उघडपणें बोललें नाहीं.

## आपण देवापासून आलों आहोंत हें येशू यरुशलेमांत शिकवितो

१४ मग सण अर्धा झाल्यावर येशू वर मंदिरांत
जाऊन शिक्षण देऊं लागला. १५ यावरून यहूदी
आश्चर्य करून म्हणाले, शिकल्यावांचून याला विद्या
कशी आली ? १६ येशूनें त्यांस उत्तर दिलें, माझी
शिकवण माझी नाहीं, तर ज्यानें मला पाठविलें त्याची
आहे. १७ त्याच्या इच्छेप्रमाणें करावयास कोणी मनांत
आणिल्यास ह्या शिकवणीविषयीं त्याला समजेल कीं ही
देवापासून आहे किंवा मी आपल्या मनचें बोलतों. १८ जो
आपल्या मनचें बोलतो, तो स्वतःचेंच गौरव पाहतो; परंतु
आपणाला ज्यानें पाठविलें त्याचें गौरव जो पाहतो तो

खरा आहे, व त्यामध्यें कांहीं अधर्म नाहीं. १९ मोशानें तुम्हांस नियमशास्त्र दिलें कीं नाहीं? तरी तुम्हांतून कोणी नियमशास्त्र पाळीत नाहीं. तुम्ही मला जिवें मारावयास कां पाहतां? २० लोकसमुदायानें उत्तर दिलें, तुला भूत लागलें आहे; तुला जिवें मारावयास कोण पाहतो? २१ येशूनें त्यांस उत्तर दिलें, मीं एक कृत्य केलें, त्यामुळें तुम्ही सर्व आश्चर्य करितां. २२ सुंता मोशापासून नाहीं तर पूर्वजांपासून आहे, म्हणून मोशानें ती तुम्हांस लावून दिली, आणि तुम्ही शब्बाथ दिवशीं ती करितां. २३ मोशाचें नियमशास्त्र मोडूं नये म्हणून मनुष्याची सुंता शब्बाथ दिवशीं होते, तर मीं शब्बाथ दिवशीं एका मनुष्याला सर्वांगीं बरें केलें यामुळें तुम्ही मजवर रागावतां काय? २४ तोंडदेखला न्याय करूं नका तर यथार्थ न्याय करा.

२५ यावरून यरुशलेमकरांतून कित्येकांनीं म्हटलें, ज्याला जिवें मारावयास पाहतात तो हाच आहेना? २६ पाहा, तो उघड बोलतो व ते त्याला कांहीं म्हणत नाहींत. हा ख्रिस्त आहे, असें अधिकाऱ्यांनीं खरोखर जाणिलें आहे काय? २७ तरी हा कोठचा आहे हें आम्हांस ठाऊक आहे; पण ख्रिस्त येईल तेव्हां तो कोठचा आहे हें कोणास कळणार नाहीं. २८ यावरून येशू मंदिरांत शिक्षण देत असतां मोठ्यानें म्हणाला, तुम्ही मला जाणतां व मी कोठचा आहें याचीहि तुम्हांला जाणीव आहे. तरी मी आपण होऊन आलों नाहीं; ज्यानें मला पाठविलें तो खरा आहे, त्याला तुम्ही ओळखीत नाहीं. २९ मी तर त्याला ओळखतों; कारण मी त्याजपासून आहें व त्यानें मला पाठविलें आहे. ३० यावरून त्यांनीं त्याला धरावयास पाहिलें; तरी कोणीं त्याजवर हात टाकिला नाहीं, कारण त्याची वेळ तोंवर आली नव्हती. ३१ तेव्हां लोकसमुदायांतील बहुत जणांनीं त्याजवर विश्वास ठेविला व म्हटलें, ख्रिस्त येईल तेव्हां तो यानें केलेल्या चिन्हांपेक्षां अधिक चिन्हें करील काय? ३२ लोकसमुदाय त्याजविषयीं अशी कुजबूज करीत आहेत हें परूश्यांनीं ऐकलें; आणि मुख्य याजक व परूशी यांनीं त्याला धरावयास कामदार पाठविले. ३३ यावरून येशूनें त्यांस म्हटलें, मी आणखी थोडा वेळ तुम्हांबरोबर आहें, मग ज्यानें मला पाठविलें त्याजकडे मी निघून जाईन. ३४ तुम्ही माझा शोध कराल तरी मी तुम्हांस सांपडणार नाहीं; आणि जेथें मी असेन तेथें तुमच्यानें येववणार नाहीं. ३५ यामुळें यहूदी आपसांत म्हणाले, हा असा कोठें जाणार कीं तो आम्हांस सांपडणार नाहीं? तो हेल्लेणी लोकांत पांगलेल्यांकडे जाणार आणि हेल्लेण्यांस शिकविणार काय? ३६ तुम्ही माझा शोध कराल तरी मी तुम्हांस सांपडणार नाहीं, आणि जेथें मी असेन तेथें तुमच्यानें येववणार नाहीं, हें जें विधान त्यानें केलें तें काय आहे?

## जीवंत पाणी

३७ मग सणाच्या शेवटल्या म्हणजे मोठ्या दिवशीं येशू उभा राहून मोठ्यानें म्हणाला, कोणी तान्हेला असला तर त्यानें मजकडे येऊन प्यावें. ३८ जो मजवर विश्वास ठेवितो त्याच्यांतून, शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें, जीवंत पाण्याच्या नद्या वाहतील. ३९ ज्यांनीं त्याजवर विश्वास ठेविला त्यांस आत्मा मिळणार होता, त्याविषयीं त्यानें हें म्हटलें; तोंपर्यंत आत्म्याचें दान झालें नव्हतें; कारण येशूचा तोंपर्यंत महिमा झाला नव्हता. ४० यास्तव लोकसमुदायांतील कित्येकांनीं हे शब्द ऐकून म्हटलें, हा खरोखर तो संदेष्टा आहे. ४१ कित्येकांनीं म्हटलें, हा ख्रिस्त आहे; काहींनीं म्हटलें, ख्रिस्त गालीलांतून येतो काय? ४२ ख्रिस्त 'दाविदाच्या वंशाचा' व ज्या 'बेथलहेमांत' दावीद होता, त्या गांवचा असा 'येणार' असें धर्मशास्त्रांत सांगितलें नाहीं काय? ४३ यावरून त्याजविषयीं लोकसमुदायांत फूट पडली. ४४ त्यांतील कित्येक जण त्याला धरावयास पाहत होते; तरी कोणीं त्याजवर हात टाकिला नाहीं.

४५ यास्तव मुख्य याजक व परूशी यांजकडे कामदार आले; त्यांस ते म्हणाले, तुम्हीं त्याला कां आणिलें नाहीं? ४६ कामदारांनीं उत्तर दिलें, कोणी मनुष्य त्याच्यासारिखा कधीं बोलला नाहीं. ४७ त्यावरून परूश्यांनीं त्यांस म्हटलें, तुम्हीहि फसलां आहां काय? ४८ अधिकाऱ्यांपैकीं किंवा परूश्यांपैकीं कोणी तरी त्याजवर विश्वास ठेविला आहे काय? ४९ जो हा लोकसमुदाय नियमशास्त्र जाणत नाहीं

तो शापित आहे. ५० त्याजकडे पूर्वी आलेला निकदेम
त्यांच्यापैकीं एक होता, तो त्यांस म्हणाला : ५१ कोणाचें
ऐकून घेतल्यावांचून व तो काय करितो ह्याची माहिती
करून घेतल्यावांचून आपलें नियमशास्त्र त्याचा न्याय करितें
काय? ५२ त्यांनीं त्याला उत्तर दिलें, तूंहि गालीलांतला
आहेस काय? शोध करून पाहा कीं गालीलांत कोणी
संदेष्टा उत्पन्न होत नाहीं.
[ ५३ मग ते सर्व आपापल्या घरीं निघून गेले;

### व्यभिचारी स्त्री

१ येशू जैतुनांच्या डोंगराकडे गेला. २ नंतर
८ मोठ्या सकाळीं तो पुनः मंदिरांत आला तेव्हां सर्व
लोक त्याजकडे आले; आणि तो बसून त्यांस शिकवूं
लागला. ३ त्या वेळीं शास्त्री व परूशी यांनीं व्यभिचार
करीत असतांना धरिलेल्या एका स्त्रीला त्याजकडे आणिलें;
व तिला मध्यें उभें करून त्याला म्हटलें, ४ गुरुजी, ह्या
स्त्रीला ती व्यभिचार करीत असतांना धरण्यांत आलें
आहे. ५ मोशानें नियमशास्त्रांत आम्हांस अशी आज्ञा दिली
आहे कीं अशांस दगडमार करावा; तर आपण
तिजविषयीं काय सांगतां? ६ त्याजवर दोष ठेवावयाला
आपणांस कांहीं निमित्त मिळावें म्हणून त्याची परीक्षा
पाहण्याकरितां त्यांनीं हें म्हटलें. येशू तर खालीं ओणवून
बोटानें भूमीवर लिहूं लागला; ७ आणि ते त्याला एक-
सारखें विचारीत असतां तो उठून त्यांस म्हणाला, तुम्हांमध्यें
जो निष्पाप असेल त्यानें प्रथम तिजवर दगड टाकावा.
८ मग तो पुनः खालीं ओणवून भूमीवर लिहूं लागला.
९ हें ऐकून वडिलांपासून आरंभ करून शेवटल्या इसमा-
पर्यंत एकामागून एक असे ते सर्व निघून गेले; येशू एकटा
राहिला आणि तेथेंच ती स्त्री मध्यें उभी होती. १० नंतर
येशू उठला व ( स्त्रीशिवाय तेथें कोणी नाहीं असें पाहून )
तिला म्हणाला, बाई, तुला दोष देणारे ते कोठें आहेत?
तुला कोणीं दंड ठरविला नाहीं काय? ११ ती म्हणाली,
प्रभुजी, कोणीं नाहीं. तेव्हां येशू तिला म्हणाला, मीहि
तुला दंड ठरवीत नाहीं; जा; यापुढें पाप करूं नको. ]

### जगताचा प्रकाश

१२ पुढें येशूनें पुनः त्यांजबरोबर बोलणें आरंभून
म्हटलें, मी जगाचा प्रकाश आहें; जो मला अनुसरतो
तो अंधारांत चालणार नाहीं, तर त्याच्याजवळ जीवनाचा
प्रकाश राहील. १३ यावरून परूशी त्याला म्हणाले, तुम्ही
स्वतःविषयीं साक्ष देतां; तुमची साक्ष खरी नाहीं. १४
येशूनें त्यांस उत्तर दिलें, मी स्वतःविषयीं साक्ष देतों, तरी
माझी साक्ष खरी आहे; कारण मी कोठून आलों व कोठें
जातों हें मला ठाऊक आहे; मी कोठून येतों व कोठें
जातों हें तुम्हांस ठाऊक नाहीं. १५ तुम्ही देहबुद्धीनें न्याय
करितां; मी कोणाचा न्याय करीत नाहीं, १६ आणि जर
मीं कोणाचा न्याय केला तर माझा न्याय खरा आहे;
कारण मी एकटा नाहीं, तर मी व ज्यानें मला पाठविलें
तो, असें आहों. १७ तुमच्या नियमशास्त्रांत असें लिहिलें
आहे कीं दोन मनुष्यांची साक्ष खरी आहे. १८ मी स्वतः-
विषयीं साक्ष देणारा आहें, आणि ज्या पित्यानें मला
पाठविलें तोहि मजविषयीं साक्ष देतो. १९ यावरून ते
त्याला म्हणाले, तुमचा पिता कोठें आहे? येशूनें उत्तर
दिलें, तुम्ही मला व माझ्या पित्यालाहि ओळखीत नाहीं;
तुम्हीं मला ओळखिलें असतें तर माझ्या पित्यालाहि
ओळखिलें असतें. २० तो मंदिरांत शिकवीत असतां हीं
वचनें जामदारखान्यांत बोलला; तरी कोणीं त्याला धरिलें
नाहीं, कारण त्याची वेळ तोंपर्यंत आली नव्हती.

### ओढवणाऱ्या संकटाविषयीं इशारे

२१ ह्यानंतर तो पुनः त्यांस म्हणाला, मी निघून
जातों, तुम्ही माझा शोध कराल आणि आपल्या पापांत
मराल; जेथें मी जातों तेथें तुम्हांला येतां येत नाहीं. २२
यावर यहूदी म्हणाले, जेथें मी जातों तेथें तुम्हांला येतां येत
नाहीं असें हा म्हणतो, यावरून हा स्वतःला जिवें मारून
तर घेणार नाहीं? २३ त्यानें त्यांस म्हटलें, तुम्ही खालचे
आहां, मी वरचा आहें, तुम्ही या जगाचे आहां, मी या
जगाचा नाहीं; २४ ह्यामुळें मीं तुम्हांस सांगितलें कीं
तुम्ही आपल्या पापांत मराल; कारण मी तो आहें असा
विश्वास तुम्हीं न धरिल्यास तुम्ही आपल्या पापांत मराल.
२५ ह्यावरून त्यांनीं त्याला म्हटलें, तूं कोण आहेस?
येशूनें त्यांस म्हटलें, जें पहिल्यापासून तुम्हांस सांगत
आलों तेंच. २६ तुम्हांविषयीं मला पुष्कळ बोलावयाचें

आहे व न्यायनिवाडा करावयाचा आहे; परंतु ज्यानें मला पाठविलें तो खरा आहे आणि ज्या गोष्टी मीं त्याजपासून ऐकल्या त्या मीं जगास सांगतों. २७ तो आपल्याबरोबर पित्याविषयीं बोलत आहे, हें त्यांस समजलें नाहीं. २८ यास्तव येशूनें त्यांस म्हटलें, जेव्हां तुम्ही मनुष्याच्या पुत्राला उंच कराल तेव्हां तुम्हांला समजेल कीं मी तो आहें, आणि मी आपण होऊन कांहीं करीत नाहीं, तर पित्यानें मला शिकविल्याप्रमाणें मी या गोष्टी बोलतों. २९ ज्यानें मला पाठविलें तो माझ्याबरोबर आहे; त्यानें मला एकटें सोडिलें नाहीं; कारण जें त्याला आवडतें तें मी सर्वदा करितों. ३० तो या गोष्टी बोलत असतां पुष्कळशा लोकांनीं त्याजवर विश्वास ठेविला.

### यहूद्यांबरोबर झालेला वादविवाद

३१ ज्या यहूद्यांनीं त्याचें खरें मानिलें त्यांस येशूनें म्हटलें, तुम्ही माझ्या वचनांत राहिलां तर खरोखर माझे शिष्य आहां; ३२ तुम्हांस सत्य समजेल, व सत्य तुम्हांस स्वतंत्र करील. ३३ त्यांनीं त्याला म्हटलें, आम्ही अब्राहामाचे वंशज आहों, व कधींहि कोणाच्या दास्यांत नव्हतों; तर तुम्ही स्वतंत्र व्हाल असें तुम्ही कसें म्हणतां? ३४ येशूनें त्यांस उत्तर दिलें, मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों, जो कोणी पाप करितो तो पापाचा दास आहे. ३५ दास घरांत सदासर्वदा राहत नाहीं, पुत्र सदासर्वदा राहतो. ३६ यास्तव जर पुत्र तुम्हांस स्वतंत्र करील तर तुम्ही खरेखरे स्वतंत्र व्हाल. ३७ तुम्ही अब्राहामाचे वंशज आहां हें मला ठाऊक आहे तरी तुम्हांमध्यें माझ्या वचनाची प्रगति होत नाहीं, म्हणून तुम्ही मला जिवें मारावयास पाहतां. ३८ मीं पित्याजवळ जें पाहिलें तें बोलतों, तसेंच तुम्हीं आपल्या पित्यापासून जें ऐकलें तें करतां. ३९ त्यांनीं त्याला उत्तर दिलें, आमचा पिता अब्राहाम आहे. येशूनें त्यांस म्हटलें, तुम्ही अब्राहामाचीं मुलें असतां तर तुम्ही अब्राहामाचीं कृत्यें केलीं असतीं; ४० परंतु ज्यानें देवापासून ऐकलेलें सत्य तुम्हांस सांगितलें त्या मनुष्याला, म्हणजे मला, तुम्ही आतां जिवें मारावयास पाहतां; अब्राहामानें असें केलें नाहीं. ४१ तुम्ही आपल्या पित्याचीं कृत्यें करितां. ते त्याला म्हणाले, आम्ही व्यभिचारापासून जन्मलों नाहीं. आम्हांस एकच पिता, म्हणजे देव आहे. ४२ येशूनें त्यांस म्हटलें, देव जर तुमचा पिता असता तर तुम्हीं मजवर प्रीति केली असती; कारण मी देवापासून निघालों व आलों आहें; मीं आपण होऊन आलों नाहीं, तर त्यानें मला पाठविलें. ४३ तुम्ही माझें बोलणें कां समजत नाहीं? याचें कारण असें कीं तुमच्यानें माझें वचन ऐकवत नाहीं. ४४ तुम्ही आपला बाप सैतान यापासून झालेले आहां, आणि आपल्या बापाच्या वासनांप्रमाणें करावयास पाहतां. तो प्रारंभापासून मनुष्यघातक आहे आणि तो सत्यांत टिकला नाहीं, कारण त्याजमध्यें सत्य नाहीं. तो खोटें बोलतो तें स्वतः होऊनच बोलतो; कारण तो लबाड व लबाडाचा बाप आहे. ४५ मी तर तुम्हांस सत्य सांगतों म्हणून तुम्ही माझा विश्वास धरीत नाहीं. ४६ तुम्हांतील कोण मजवर पाप लागू करील? मी सत्य सांगत असतां तुम्ही माझा विश्वास कां धरीत नाहीं? ४७ जो देवाकडला आहे तो देवाच्या गोष्टी ऐकतो; तुम्ही देवाकडले नाहीं म्हणून तुम्ही ऐकत नाहीं. ४८ यहूद्यांनीं त्याला उत्तर दिलें, तूं शोमरोनी आहेस व तुला भूत लागलें आहे, हें आम्ही खरें म्हणतों कीं नाहीं? ४९ येशूनें उत्तर दिलें, मला भूत लागलें नाहीं; तर मी आपल्या पित्याचा सन्मान करितों; आणि तुम्ही माझा अपमान करितां. ५० मी स्वतःचें गौरव पाहत नाहीं; तें पाहणारा व न्यायनिवाडा करणारा एक जण आहे. ५१ मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों, जर कोणी माझें वचन पाळील तर तो कधींहि मरण पाहणार नाहीं. ५२ यहूदी त्याला म्हणाले, तुला भूत लागलें आहे हें आतां आम्हांस कळलें. अब्राहाम व संदेष्टेहि मेले; आणि तूं म्हणतोस, जर कोणी माझें वचन पाळील तर त्याला मरणाचा अनुभव कधींहि येणार नाहीं. ५३ आमचा बाप अब्राहाम मेला त्यापेक्षां तूं मोठा आहेस काय? संदेष्टेहि मेले; तूं आपणाला कोण म्हणवितोस? ५४ येशूनें उत्तर दिलें, मी स्वतः आपलें गौरव केलें तर तें कांहीं माझें गौरव नाहीं; माझें गौरव करणारा माझा पिता आहे; तो आमचा देव आहे असें तुम्ही त्याला म्हणतां, ५५ तरी तुम्हीं त्याला ओळखलें नाहीं; मी त्याला ओळखतों; आणि मी त्याला ओळखीत नाहीं असें जर म्हणेन

तर तुमच्यासारखा लबाड होईन; मी त्याला ओळखितों व
त्याचें वचन पाळितों. ५६ तुमचा बाप अब्राहाम माझा
दिवस पाहण्याच्या उत्कंठेनें उल्लासित झाला व तो पाहून
त्याला हर्ष झाला. ५७ यावरून यहूदी त्याला म्हणाले, तुला
अजून पन्नास वर्षे झालीं नाहींत आणि तूं अब्राहामाला
पाहिलें काय ? ५८ येशूनें त्यांस म्हटलें, मी तुम्हांस खचीत
खचीत सांगतों, अब्राहाम झाला त्यापूर्वी मी आहें. ५९
यावरून त्यांनीं त्याजवर फेकण्याकरितां दगड उचलिले;
परंतु येशू [ त्यांच्यामधून जाऊन ], मंदिरांतून गुप्तपणें
निघून गेला.

## जन्मांधाला डोळे देणें

१ तो तिकडून जात असतां त्यानें एका
९ जन्मांध मनुष्यास पाहिलें. २ तेव्हां त्याच्या शिष्यांनीं
त्याला विचारलें, गुरुजी, ह्यानें अंधळें जन्मावें असें
पाप कोणीं केलें : यानें किंवा याच्या आईबापांनीं ? ३
येशूनें उत्तर दिलें, यानें किंवा याच्या आईबापांनीं पाप
केलें असें नाहीं, तर ह्याच्या ठायीं देवाचीं कार्ये प्रगट
व्हावीं म्हणून हा असा जन्मला. ४ मला ज्यानें पाठविलें
त्याचीं कार्ये दिवस आहे तोंपर्यंत आपल्याला केलीं पाहिजेत;
रात्र येणार आहे, तिच्यांत कोणाच्यानें कार्य करवणार नाहीं.
५ मी जगांत आहें तोंवर मी जगाचा प्रकाश आहें. ६
असें बोलून तो भूमीवर थुंकला, थुंकीनें त्यानें चिखल
केला; तो चिखल त्याच्या डोळ्यांस लाविला; ७ आणि
त्याला म्हटलें, जा; शिलोह ( म्हणजे पाठविलेला ) तळ्यांत
धू, मग त्यानें जाऊन धुतल्यावर तो डोळस होऊन आला.
८ यावरून शेजारी व ज्यांनीं त्याला भिकारी असें पूर्वी
पाहिलें होतें ते म्हणाले, बसून भीक मागणारा तो हाच
नाहीं काय ? ९ कित्येक म्हणाले, तोच हा आहे; दुसरे
म्हणाले, नाहीं, त्यासारिखा आहे; तो म्हणाला, मी तोच
आहें. १० यावरून त्यांनीं त्याला म्हटलें, तुझे डोळे कसे
उघडले ? ११ त्यानें उत्तर दिलें, येशू नांवाच्या मनुष्यानें
चिखल करून माझ्या डोळ्यांस लाविला, आणि मला
सांगितलें, शिलोहवर जाऊन धू; मीं जाऊन धुतलें आणि
मला दृष्टि आली. १२ तेव्हां त्यांनीं त्याला म्हटलें, तो कोठें
आहे ? तो म्हणाला, मला ठाऊक नाहीं.

१३ मग जो पूर्वी अंधळा होता त्याला त्यांनीं परूश्यांकडे
नेलें. १४ ज्या दिवशीं येशूनें चिखल करून त्याचे डोळे
उघडिले, तो दिवस शब्बाथ होता. १५ यास्तव परूश्यांनींहि
त्याला पुनः विचारिलें, तुला दृष्टि कशी आली ? तो त्यांस
म्हणाला, त्यानें माझ्या डोळ्यांस चिखल लाविला, तो मीं
धुऊन टाकिल्यावर मला दिसूं लागलें. १६ यावरून परू-
श्यांतील कित्येक म्हणाले, तो मनुष्य देवापासून नाहीं, कारण
तो शब्बाथ पाळीत नाहीं; दुसरे म्हणाले, पापी माणसा-
च्यानें अशीं चिन्हें कशीं करवतील ? अशी त्यांच्यामध्यें
फूट पडली. १७ यास्तव पुनः ते त्या अंधळ्याला
म्हणाले, त्यानें तुझे डोळे उघडिले तर त्याजविषयीं
तूं काय म्हणतोस ? त्यानें म्हटलें, तो संदेष्टा आहे.
१८ यहूद्यांनीं दृष्टि प्राप्त झालेल्या त्या इसमाच्या
आईबापांस बोलावून विचारपूस करीपर्यंत तो अंधळा
असून आतां डोळस झाला आहे, हें खरें मानिलें
नाहीं. १९ त्यांनीं त्यांस विचारिलें, जो तुमचा पुत्र
अंधळा जन्मला म्हणून म्हणतां तो हाच काय ? तर
त्याला आतां कसें दिसतें ? २० त्याच्या आईबापांनीं
उत्तर दिलें, हा आमचा पुत्र आहे व अंधळा जन्मला हें
आम्हांस ठाऊक आहे; २१ तरी त्याला आतां कसें दिसतें
हें आम्हांस ठाऊक नाहीं; किंवा त्याचे डोळे कोणीं उघडिले
हेंहि आम्हांस ठाऊक नाहीं; त्याला विचारा; तो वयांत
आलेला आहे; तो स्वतःविषयीं सांगेल. २२ त्याच्या
आईबापांस यहूद्यांचें भय होतें म्हणून त्यांनीं असें म्हटलें;
कारण हा ख्रिस्त आहे असें कोणीं पत्करल्यास त्याला
सभाबहिष्कृत करावें असा यहूद्यांनीं अगोदरच एकोपा केला
होता. २३ यामुळें त्याच्या आईबापांनीं म्हटलें; तो वयांत
आलेला आहे त्याला विचारा. २४ मग जो मनुष्य पूर्वी
अंधळा होता त्याला त्यांनीं दुसऱ्यानें बोलावून म्हटलें,
देवाचें गौरव कर; तो मनुष्य पापी आहे हें आम्हांस
ठाऊक आहे; २५ यावरून त्यानें उत्तर दिलें, तो पापी
आहे किंवा नाहीं हें मला ठाऊक नाहीं, पण मला एक
ठाऊक आहे कीं मी पूर्वी अंधळा होतों व आतां मला
दिसतें. २६ यावर त्यांनीं त्याला म्हटलें, त्यानें तुला काय
केलें ? त्यानें तुझे डोळे कसे उघडिले ? २७ त्यानें त्यांस

उत्तर दिलें, आतांच मीं तुम्हांस सांगितलें तरी तुम्हीं ऐकलें
नाहीं; पुन्हां ऐकावयाची इच्छा कां करितां ? तुम्हीहि त्याचे
शिष्य होऊं पाहतां काय ? २८ तेव्हां त्यांनीं त्याची निर्भ-
र्त्सना करून म्हटलें, तूं त्याचा शिष्य आहेस; आम्ही
मोशाचे शिष्य आहों. २९ देव मोशाबरोबर बोलला आहे
हें आम्हांस ठाऊक आहे; हा कोठला आहे हें ठाऊक नाहीं.
३० त्या मनुष्यानें त्यांस उत्तर दिलें; हेंच मोठें आश्चर्य
आहे कीं तो कोठला आहे हें तुम्हांस ठाऊक नाहीं; पण
त्यानें तर माझे डोळे उघडिले. ३१ आपल्याला ठाऊक
आहे कीं देव पापिष्ट लोकांचें ऐकत नाहीं; तर जो कोणी
देवभक्त असून त्याच्या इच्छेप्रमाणें वर्ततो त्याचें तो ऐकतो.
३२ जन्मांधाचे डोळे कोणीं उघडिले, असें युगाच्या
आरंभापासून कधीं ऐकण्यांत आलें नव्हतें. ३३ हा देवा-
पासून नसता तर ह्याच्यानें कांहीं करवलें नसतें. ३४ त्यांनीं
त्याला म्हटलें, तूं अगदीं पापांत जन्मलास, आणि आम्हांस
शिकवितोस काय ? मग त्यांनीं त्याला बाहेर घालविलें.

३५ त्यांनीं त्याला बाहेर घालविलें हें येशूनें ऐकलें;
आणि तो आढळल्यावर त्याला म्हटलें, तूं देवाच्या पुत्रावर
विश्वास ठेवितोस काय ? ३६ त्यानें उत्तर दिलें, प्रभुजी,
मीं त्याजवर विश्वास ठेवावा असा तो कोण आहे ? ३७
येशूनें त्याला म्हटलें, तूं त्याला पाहिलें आहे व तुजबरोबर
आतां बोलत आहे तोच तो आहे. ३८ तो म्हणाला,
प्रभुजी, मी विश्वास ठेवितों; आणि त्यानें त्याला नमन केलें.
३९ तेव्हां येशू म्हणाला, मी न्यायनिवाड्यासाठीं या जगांत
आलों, यासाठीं कीं ज्यांस दिसत नाहीं त्यांस दिसावें; आणि
ज्यांस दिसतें त्यांनीं अंधळे व्हावें. ४० परूश्यांतील जे
त्याच्याजवळ होते त्यांनीं हें ऐकून त्याला म्हटलें, आम्हीहि
अंधळे आहों काय ? ४१ येशू त्यांस म्हणाला, तुम्ही अंधळे
असतां तर तुम्हांला पाप नसतें; परंतु आम्हांस दिसतें असें
तुम्ही आतां म्हणतां, म्हणून तुमचें पाप तसेंच राहतें.

## उत्तम मेंढपाळ

१ मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों, जो
१० मेंढवाड्यांत दारानें आंत न जातां दुसरीकडून चढून
जातो तो चोर व लुटारू आहे. २ जो दारानें आंत
जातो तो मेंढरांचा राखणारा आहे; ३ त्याला द्वारपाल दार
उघडितो; मेंढरें त्याची वाणी ऐकतात; तो आपल्या मेंढरांस
ज्याच्या त्याच्या नांवानें हाक मारितो व त्यांस बाहेर नेतो.
४ आपलीं सर्व मेंढरें बाहेर काढिल्यावर तो त्यांच्यापुढें
चालतो, व मेंढरें त्याच्यामागें चालतात; कारण तीं त्याची
वाणी ओळखतात. ५ तीं परक्याच्या मागें जाणार नाहींत,
तर त्याजपासून पळतील; कारण तीं परक्यांची वाणी
ओळखीत नाहींत. ६ हा दृष्टांत येशूनें त्यांस सांगितला;
तरी ज्या गोष्टी तो त्यांजबरोबर बोलला त्या काय आहेत
हें ते समजले नाहींत.

७ यास्तव येशू त्यांस पुनः म्हणाला, मी तुम्हांस खचीत
खचीत सांगतों कीं मी मेंढरांचें दार आहें. ८ जे माझ्या-
पूर्वी आले ते सर्व चोर व लुटारू आहेत; त्यांचें मेंढरांनीं
ऐकलें नाहीं. ९ मी दार आहें; माझ्याद्वारें कोणी आंत
जाईल तर त्याला तारणप्राप्ति होईल; तो आंत येईल व
बाहेर जाईल आणि त्याला खावयास मिळेल. १० चोर येतो
तो केवळ चोरी, घात व नाश करावा या हेतूनें येतो; मी
आलों आहें तो त्यांना जीवनप्राप्ति व्हावी व ती विपुलपणें
व्हावी म्हणून आलों आहें. ११ मी उत्तम मेंढपाळ आहें;
उत्तम मेंढपाळ मेंढरांकरितां आपला जीव देतो. १२ जो
मेंढपाळ नव्हे व ज्याचीं स्वतःचीं मेंढरें नव्हत असा मोलकरी,
लांडगा येतां पाहून मेंढरें सोडून पळून जातो आणि लांडगा
त्यांवर झडप घालून त्यांची दाणादाण करितो; १३ मोल-
करी पळून जातो, कारण तो मोलकरीच आहे, त्याला
मेंढरांची काळजी नाहीं. १४, १५ मी उत्तम मेंढपाळ
आहें; जसा पिता मला व मी पित्याला ओळखतों तसें जे
माझे आहेत त्यांस मी ओळखतों, व जे माझे आहेत
ते मला ओळखतात; आणि मेंढरांसाठीं मी आपला जीव
देतों. १६ या मेंढवाड्यांतलीं नव्हत अशीं माझीं दुसरीं
मेंढरें आहेत, तींहि मला आणिलीं पाहिजेत; तीं माझी
वाणी ऐकतील; मग एक कळप, एक मेंढपाळ, असें
होईल. १७ मी आपला जीव परत घेण्याकरितां
देतों, म्हणून पिता मजवर प्रीति करितो. १८
तो कोणी मजपासून घेत नाहीं, तर मी होऊनच
तो देतों. मला तो देण्याचा अधिकार आहे व तो
परत घेण्याचाहि अधिकार आहे. ही आज्ञा मला

आपल्या पित्यापासून प्राप्त झाली आहे.
१९ या शब्दांवरून यहूद्यांत पुनः फूट पडली.
२० त्यांच्यांतील पुष्कळ जण म्हणाले, त्याला भूत
लागलें आहे व तो वेडा आहे; त्याचें तुम्ही कां
ऐकतां ? २१ दुसरे म्हणाले, हीं वचनें भूतग्रस्ताचीं
नव्हत, भूताला आंधळ्यांचे डोळे उघडतां येतात
काय ?

## पुनःस्थापनाच्या सणाच्या वेळीं येशू

२२ यरुशलेमांत पुनःस्थापनाचा सण असून हिंवाळा
होता; २३ आणि येशू मंदिरामध्यें शलमोनाच्या
देवडींत फिरत होता. २४ तेव्हां यहूद्यांनीं त्याला
गराडा घालून म्हटलें, तूं कोठवर आमचा जीव संशयांत
ठेवतोस ? तूं ख्रिस्त असलास तर आम्हांस उघड
सांग. २५ येशूनें त्यांस उत्तर दिलें, मीं तुम्हांस
सांगितलें तरी तुम्ही विश्वास धरीत नाहीं; जीं कृत्यें
मी आपल्या पित्याच्या नामानें करितों तीं मजविषयीं
साक्ष देतात. २६ तुम्ही विश्वास धरीत नाहीं; कारण
तुम्ही माझ्या मेंढरांतले नाहीं. २७ माझीं मेंढरें माझी
वाणी ऐकतात; मी त्यांस ओळखतों व तीं माझ्यामागें
येतात; २८ मी त्यांस सार्वकालिक जीवन देतों;
त्यांचा कधींहि नाश होणार नाहीं, आणि कोणी
त्यांस माझ्या हातांतून हिसकून घेणार नाहीं. २९
ज्यानें तीं मला दिलीं तो माझा पिता सर्वांहून मोठा
आहे; आणि पित्याच्या हातांतून त्यांस कोणाच्यानें
हिसकून घेववत नाहीं. ३० मी आणि पिता एक
आहों.

## यहूद्यांनीं दाखविलेलें शत्रुत्व

३१ तेव्हां यहूद्यांनीं त्याला दगडमार करावयास
पुनः दगड उचलिले. ३२ येशूनें त्यांस म्हटलें, मीं
पित्याचीं पुष्कळशीं चांगलीं कृत्यें तुम्हांस दाखविलीं
आहेत; त्यांतून कोणत्या कृत्यामुळें तुम्ही मला दगड-
मार करितां ? ३३ यहूद्यांनीं त्याला उत्तर दिलें,
चांगल्या कृत्यासाठीं आम्ही तुला दगडमार करीत
नाहीं, तर दुर्भाषणासाठीं; तूं मानव असून स्वतःला
देव म्हणवितोस यासाठीं. ३४ येशूनें त्यांस म्हटलें,
'तुम्ही देव आहां असें मी म्हणालों' हें तुमच्या
शास्त्रांत लिहिलें नाहीं काय ? ३५ ज्यांस देवाचें वचन
प्राप्त झालें त्यांस त्यानें देव म्हटलें (आणि शास्त्र-
लेखाचा भंग होत नाहीं); ३६ तर ज्याला पित्यानें
पवित्र कार्यास्तव नेमून जगांत पाठविलें त्या मला,
मी देवाचा पुत्र आहें असें म्हटल्यावरून, तूं दुर्भाषण
करितोस असें तुम्ही म्हणतां काय ? ३७ मी आपल्या
पित्याचीं कृत्यें करीत नसल्यास माझा विश्वास धरूं
नका; ३८ परंतु जर मी करितों तर, माझा विश्वास
न धरिला तरी त्या कृत्यांवर विश्वास ठेवा; यासाठीं
कीं मजमध्यें पिता आहे व पित्यामध्यें मी आहें हें
तुम्हीं ओळखून समजून घ्यावें. ३९ ते त्याला पुनः
धरावयास पाहूं लागले; परंतु तो त्यांच्या हातून
निघून गेला.
४० तो पुनः यार्देनेच्या पलीकडे, योहान पहि-
ल्यानें बाप्तिस्मा करीत असे त्या ठिकाणीं, गेला व
तेथें राहिला. ४१ तेव्हां त्याजकडे पुष्कळ लोक आले;
ते म्हणाले, योहानानें कांहीं चिन्ह केलें नाहीं खरें;
तरी योहानानें याजविषयीं जें कांहीं सांगितलें तें सर्व
खरें आहे. ४२ तेथें पुष्कळ लोकांनीं त्याजवर विश्वास
ठेविला.

## मृत लाजराला जीवंत करणें

११ १ मरीया व तिची बहीण मार्था यांच्या
बेथानी गांवांतला लाजर नामें एक मनुष्य
आजारी होता. २ ज्या मरीयेनें प्रभूला सुगंधी
तेल लाविलें व त्याचे चरण आपल्या केसांनीं पुसले
तिचा, हा आजारी पडलेला लाजर, भाऊ होता. ३
यास्तव त्या बहिणींनीं त्याकडे सांगून पाठविलें, प्रभुजी,
ज्याच्यावर आपलें प्रेम आहे तो आजारी आहे. ४
तें ऐकून येशू म्हणाला, हा आजार मरणासाठीं नव्हे,
तर देवाच्या गौरवार्थ, म्हणजे याच्यायोगें देवाच्या
पुत्राचें गौरव व्हावें यासाठीं आहे. ५ मार्था, तिची
बहीण व लाजर यांजवर येशूचें प्रेम असे. ६ यास्तव
तो आजारी आहे हें ऐकलें तरी तो होता त्या
ठिकाणींच आणखी दोन दिवस राहिला. ७ त्यानंतर

त्यानें शिष्यांस म्हटलें, आपण पुनः यहूदीयांत जाऊं.
८ शिष्य त्याला म्हणाले, गुरुजी, यहूदी नुकतेच आप-
णाला दगडमार करावयास पाहत होते, तरी आपण
पुनः तेथें जातां काय ? ९ येशूनें उत्तर दिलें,
दिवसाचे बारा तास आहेत कीं नाहींत ? कोणी दिव-
सास चालतो तर त्याला ठेच लागत नाहीं, कारण तो
या पृथ्वीवरील उजेड पाहतो; १० परंतु कोणी रात्रीस
चालतो तर त्याला ठेच लागते, कारण त्याच्या ठायीं
उजेड नाहीं. ११ हें बोलल्यावर त्यानें त्यांस म्हटलें,
आपला मित्र लाजर निजला आहे; मी त्याला झोपेंतून
उठवावयास जातों. १२ यावरून शिष्य त्याला म्हणाले,
प्रभुजी, त्याला झोप लागली असली तर तो पार पडेल. १३
येशू त्याच्या मरणाविषयीं असें बोलला होता; परंतु
तो झोपेपासून मिळणाऱ्या आरामाविषयीं बोलतो असें
त्यांस वाटलें. १४ यास्तव येशूनें त्यांस उघड सांगितलें,
लाजर मेला आहे; १५ आणि मी तेथें नव्हतों
म्हणून तुम्हांमुळें मला आनंद वाटतो, यासाठीं कीं तुम्हीं
विश्वास धरावा; तरी आपण त्याजकडे जाऊं. १६
तेव्हां दिदुम म्हटलेला थोमा आपल्या गुरुबंधूंस म्हणाला,
आपणहि याच्याबरोबर मरावयास जाऊं.

१७ येशू आला तेव्हां त्याला कळलें कीं त्याला
कबरेंत ठेवून चार दिवस झाले होते. १८ बेथानी
यरुशलेमापासून सुमारें पाऊण कोसावर होती; १९
तेथें मार्था व मरीया यांचें भावाबद्दल सांत्वन कर-
ण्यास यहूद्यांतील पुष्कळ लोक त्यांच्याकडे आले होते.
२० येशू येत आहे हें ऐकतांच मार्था त्याला जाऊन
भेटली. मरीया घरांतच बसून राहिली. २१ मार्था येशूला
म्हणाली, प्रभुजी, आपण एथें असतां तर माझा भाऊ
मेला नसता; २२ तरी आतांहि जें कांहीं आपण
देवाजवळ मागाल तें देव आपणाला देईल, हें मला
ठाऊक आहे. २३ येशूनें तिला म्हटलें, तुझा भाऊ
पुनः उठेल. २४ मार्था त्याला म्हणाली, तो शेव-
टल्या दिवशीं पुनरुत्थानसमयीं पुनः उठेल हें मला
ठाऊक आहे. २५ येशूनें तिला म्हटलें, पुनरुत्थान व
जीवन मीच आहें; जो मजवर विश्वास ठेवितो तो
मेला असला तरी जगेल; २६ आणि जो जीवंत
असून मजवर विश्वास ठेवितो तो कधींहि मरणार
नाहीं; याचा तूं विश्वास धरितेस काय ? २७ ती त्याला
म्हणाली, होय प्रभुजी; जो जगांत येणारा देवाचा पुत्र
ख्रिस्त तो आपण आहां असा विश्वास मीं धरिला
आहे. २८ असें बोलून ती निघून गेली, व आपली
बहीण मरीया इला गुप्तपणें बोलावून म्हणाली, गुरुजी
आले आहेत, ते तुला बोलावीत आहेत. २९ हें
ऐकतांच ती त्वरेनें उठून त्याजकडे गेली. ३० (येशू
अद्यापि गांवांत आला नव्हता, मार्था त्याला भेटली
त्या ठिकाणींच होता ) ३१ जे यहूदी मरीयेच्याजवळ
घरांत होते व तिचें सांत्वन करीत होते त्यांनीं तिला
चटकन उठून बाहेर जातांना पाहिल्यावर, ती कबरेकडे
रडावयास जात आहे असें समजून ते तिच्यामागें गेले.
३२ येशू होता तेथें मरीया आल्यावर त्याला पाहून
ती त्याच्या पायां पडली व त्याला म्हणाली, प्रभुजी,
आपण एथें असतां तर माझा भाऊ मेला नसता. ३३
येशू तिला व तिच्याबरोबर आलेल्या यहूद्यांला रडतां
पाहून आत्म्यांत खवळला व विव्हळ झाला, ३४ आणि
म्हणाला, तुम्हीं त्याला कोठें ठेविलें आहे ? ते त्याला
म्हणाले, प्रभुजी, येऊन पाहा. ३५ येशू रडला. ३६
यावरून यहूदी म्हणाले, पाहा, याचें त्याजवर किती तरी
प्रेम होतें ! ३७ परंतु त्यांच्यांतील कित्येक म्हणाले,
ज्यानें अंधळ्याचे डोळे उघडिले त्याला, ह्यानें मरूं
नये, असेंहि करण्याची शक्ति नव्हती काय ? ३८
येशू पुनः मनांत खवळून कबरेकडे आला. ती गुहा
होती, आणि तिच्या तोंडावर धोंड ठेविलेली होती.
३९ येशूनें म्हटलें, धोंड काढा. त्या मृताची बहीण
मार्था त्याला म्हणाली, प्रभुजी, आतां त्याला दुर्गंधि
येत असेल; कारण त्याला चार दिवस झाले आहेत.
४० येशूनें तिला म्हटलें, तूं विश्वास धरशील तर देवाचें
गौरव पाहशील असें मीं तुला सांगितलें नव्हतें काय ?
४१ यावरून त्यांनीं धोंड काढिली; तेव्हां येशूनें दृष्टि
वर करून म्हटलें, हे पित्या, तूं माझें ऐकलें म्हणून
मी तुझे आभार मानितों; ४२ मला माहीत आहे, तूं

सर्वदा माझें ऐकतोस, तरी जो लोकसमुदाय सभोंवता
उभा आहे त्याच्याकरितां मी बोललों; यासाठीं कीं तूं
मला पाठविलें आहे असा त्यांनीं विश्वास धरावा. ४३
असें बोलून त्यानें मोठ्यानें हाक मारून म्हटलें, लाजरा,
बाहेर ये. ४४ तेव्हां मृत झालेला तो इसम बाहेर
आला; त्याचे हातपाय प्रेतवस्त्रांनीं बांधिलेले व तोंड
रुमालानें वेष्टिलेलें होतें. येशूनें त्यांस म्हटलें, त्याला
मोकळें करून जाऊं द्या.

४५ मरीयेकडे जे यहूदी आले त्यांनीं, त्यानें जें
केलें, तें पाहिलें, आणि त्यांच्यापैकीं पुष्कळ जणांनीं
त्याजवर विश्वास ठेविला; ४६ पण कित्येकांनीं परूश्यां-
कडे जाऊन येशूनें काय केलें तें त्यांस सांगितलें.

### मुख्य याजक येशूला ठार मारण्याचा कट करतात

४७ यावरून मुख्य याजकांनीं व परूश्यांनीं सभा भरवून
म्हटलें, आपण काय करीत आहों ? कारण तो मनुष्य पुष्कळ
चिन्हें करितो; ४८ आपण त्याला असेंच सोडिलें तर
सर्व लोक त्याजवर विश्वास ठेवितील; आणि रोमी लोक
येऊन आपलें स्थान व राष्ट्रहि घेतील. ४९ तेव्हां
त्यांच्यापैकीं कयफा नांवाचा कोणीएक मनुष्य त्या वर्षी
प्रमुख याजक होता, तो त्यांस म्हणाला, तुम्हांला
कांहींच कळत नाहीं; ५० तुम्ही हेंहि लक्षांत आणीत
नाहीं कीं प्रजेसाठीं एका मनुष्यानें मरावें आणि सर्व
राष्ट्राचा नाश होणें टळावें हें तुम्हांस हितावह आहे.
५१ हें तर तो आपल्या मनचें बोलला नाहीं; तर
त्या वर्षी तो प्रमुख याजक होता म्हणून त्यानें संदेश
दिला कीं येशू त्या राष्ट्राकरितां मरणार आहे; ५२
आणि केवळ त्या राष्ट्राकरितां असें नाहीं, तर याकरितां
कीं त्यानें देवाच्या पांगलेल्या मुलांसहि जमवून एक
करावें. ५३ यावरून त्या दिवसापासून त्यांनीं त्याला
जिवें मारण्याचा निश्चय केला.

५४ यामुळें येशू तेव्हांपासून यहूदी लोकांमध्यें
उघडपणें फिरला नाहीं, तर तेथून रानाजवळच्या
प्रांतांतील एफ्राईम नामें नगरांत गेला; आणि तेथें
आपल्या शिष्यांसुद्धां राहिला. ५५ तेव्हां यहूद्यांचा
वल्हांडण सण जवळ आला होता; आणि पुष्कळ लोक
वल्हांडणाच्या अगोदर आपणांस शुद्ध करून घ्यावयास
बाहेरगांवाहून वर यरुशलेमास गेले. ५६ त्यांनीं येशूचा
शोध केला आणि मंदिरांत उभे असतांना एकमेकांस
म्हटलें, तुम्हांस कसें वाटतें ? तो सणास येणार नाहीं
काय ? ५७ मुख्य याजकांनीं व परूश्यांनीं त्याला
धरण्याच्या हेतूनें अशी ताकीद केली होती कीं तो
कोठें आहे हें कोणाला कळल्यास त्यानें खबर द्यावी.

### बेथानी येथें मरीयेनें येशूला केलेला तैलाभ्यंग

१२ १ मग येशू वल्हांडणाच्या पूर्वी सहा दिवस
बेथानीस आला; ज्या लाजराला येशूनें मेलेल्यांतून
उठविलें तो तेथें होता. २ तेथें त्यांनीं त्याच्यासाठीं
जेवणावळ केली; तेव्हां मार्था सेवा करीत होती; आणि
लाजर त्याच्या पंक्तीस बसणाऱ्यांपैकीं एक होता, ३ तेव्हां
मरीयेनें अर्धा शेर शुद्ध जटामांसीचें मोलवान् सुगंधी तेल
घेऊन येशूच्या चरणांस लाविलें, आणि आपल्या केसांनीं
त्याचे चरण पुसले; तेव्हां त्या सुगंधी तेलाच्या वासानें
घर भरून गेलें. ४ त्याला धरून देणारा, त्याच्या शिष्यां-
तील यहूदा इस्कर्योत नामें एक जण म्हणाला, ५ हें सुगंधी
तेल पाऊणशें रुपयांस विकून ते गरिबांस कां दिलें नाहींत ?
६ त्याला गरिबांची काळजी होती म्हणून तो हें म्हणाला
असें नाहीं; तर तो चोर असून त्याच्याजवळ डबी होती;
तींत जें टाकण्यांत येई तें तो चोरून घेत असे, म्हणून असें
म्हणाला. ७ यावरून येशूनें म्हटलें, माझ्या उत्तरकार्याच्या
दिवसासाठीं तें तिला ठेवूं द्या; ८ कारण गरीब नेहमीं तुम्हां-
जवळ आहेत; परंतु मी तुम्हांजवळ नेहमीं आहें असें नाहीं.
९ तो तेथें आहे असें यहूद्यांतील साधारण लोकांपैकीं
पुष्कळांस कळलें; आणि केवळ येशूकरितांच नाहीं, तर ज्या
लाजराला त्यानें मेलेल्यांतून उठविलें होतें त्यालाहि
पाहण्याकरितां ते आले. १० मुख्य याजकांनीं लाजरालाहि
जिवें मारण्याचा निश्चय केला. ११ कारण त्याजमुळें
पुष्कळ यहूदी त्यांना सोडून येशूवर विश्वास ठेवीत होते.

### जयोत्सवानें यरुशलेमांत प्रवेश

१२ दुसऱ्या दिवशीं सणास आलेला मोठा लोकसमुदाय
येशू यरुशलेमास येत आहे असें ऐकून १३ खजुरीच्या

झावळ्या घेऊन त्याच्या भेटीस बाहेर निघाला, आणि गजर
करून म्हणाला: 'होसान्ना; प्रभूच्या नामानें येणारा,' इस्रा-
एलाचा राजा 'धन्यवादित असो.' १४ येशूला लहान
गाढव मिळाल्यावर त्याच्यावर तो बसला; १५ हें
लिहिल्याप्रमाणें घडलें, तें असें: 'हे सीयोनेच्या कन्ये,
भिऊं नको, पाहा, तुझा राजा गाढवीच्या शिंगरावर बसून
येतो.' १६ या गोष्टी त्याचे शिष्य प्रथम समजले नव्हते;
येशूचें गौरव झाल्यावर त्यांस आठवण झाली कीं त्याज-
विषयीं या गोष्टी लिहिल्या असून त्याप्रमाणें लोकांनीं त्याला
केलें. १७ त्यानें लाजराला कबरेंतून बोलावून मेलेल्यांतून
उठविलें, त्या वेळेस जो लोकसमुदाय त्याजबरोबर होता
त्यानें साक्ष दिली. १८ ह्यावरूनहि लोक त्याला भेटावयास
गेले, कारण त्यानें हें चिन्ह केलें होतें असें त्यांनीं ऐकलें.
१९ यास्तव परूशी एकमेकांस म्हणाले, तुमचें कांहीं चालत
नाहीं हें लक्षांत आणा; पाहा, जग त्याच्यामागें
चाललें आहे.

## हेल्लेण्यांची विनंति

२० सणांत उपासना करावयास आलेल्या लोकांपैकीं
कांहीं हेल्लेणी होते; २१ त्यांनीं गालीलांतील बेथसैदाकर
फिलिप्प याच्याजवळ येऊन विनंति केली कीं महाराज,
येशूला भेटावें असें आमच्या मनांत आहे. २२ फिलिप्पानें
येऊन अंद्रियाला सांगितलें, आणि अंद्रिया व फिलिप्प
यांनीं येऊन येशूला सांगितलें. २३ येशूनें त्यांस म्हटलें,
मनुष्याच्या पुत्राचें गौरव होण्याची वेळ आली आहे. २४
मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों, गव्हाचा दाणा जमिनींत
पडून मेला नाहीं तर तो एकटाच राहतो; आणि मेला तर
बहुत पीक देतो. २५ जो आपल्या जिवावर प्रीति करितो
तो त्याला मुकेल; आणि जो या जगांत आपल्या जिवाचा
द्वेष करतो तो त्याचें सार्वकालिक जीवनासाठीं रक्षण करील.
२६ जर कोणी माझी सेवा करील तर त्यानें मला अनुस-
रावें; म्हणजे जेथें मी आहें तेथें माझा सेवकहि असेल;
कोणी माझी सेवा करील तर पिता त्याचा मान करील.
२७ आतां माझा जीव व्याकुळ झाला आहे; मी काय
बोलूं? २८ हे पित्या या घटकेपासून माझें रक्षण कर;
तरी मी यासाठींच या घटकेंत आलों आहें; हे पित्या, तूं
आपल्या नामाचें गौरव कर. तेव्हां अशी आकाशवाणी
झाली कीं मीं तें गौरविलें आहे आणि पुनःहि गौरवीन.
२९ तेव्हां जे लोक उभे राहून ऐकत होते ते म्हणाले,
गर्जना झाली; दुसरे म्हणाले, त्याच्याबरोबर देवदूत बोलला.
३० येशूनें उत्तर दिलें, ही वाणी मजसाठीं नाहीं, तर
तुम्हांसाठीं झाली. आतां या जगाचा न्याय होतो; ३१
आतां या जगाचा अधिकारी बाहेर टाकिला जाईल. ३२
मला पृथ्वीपासून उंच केलें तर मी आपणाकडे सर्वांस
ओढीन. ३३ आपण कोणत्या मरणानें मरणार हें सुचविण्या-
करितां तो असें बोलला. ३४ यास्तव लोकांनीं त्याला
विचारिलें, ख्रिस्त सर्वकाळ राहील असें आम्हीं नियमशास्त्रां-
तून ऐकलें आहे; तर मनुष्याच्या पुत्राला उंच केलें पाहिजे
असें आपण कसें म्हणतां? हा मनुष्याचा पुत्र आहे तरी
कोण? ३५ यावरून येशूनें त्यांस म्हटलें, आणखी थोडा
वेळ तुम्हांमध्यें उजेड आहे, तुम्हांस अंधारानें गाठूं नये
म्हणून तुम्हांस उजेड आहे तोंपर्यंत चाला; कारण जो
अंधारांत चालतो त्याला आपण कोठें जातों हें कळत नाहीं;
३६ तुम्हीं उजेडाचे पुत्र व्हावें म्हणून तुम्हांस उजेड आहे
तोंपर्यंत उजेडावर विश्वास ठेवा.

येशू या गोष्टी बोलला आणि निघून जाऊन त्यांच्या-
पासून गुप्त राहिला.

## यहूदीयांत दिसून आलेली अश्रद्धा; तरी तेथें असलेले कांहीं गुप्त शिष्य

३७ त्यानें त्यांच्यासमोर इतकीं चिन्हें केलीं असतांहि
त्यांनीं त्याजवर विश्वास ठेविला नाहीं; ३८ यासाठीं
कीं यशया संदेष्ट्यानें जी गोष्ट सांगितली होती ती पूर्ण
व्हावी; ती अशी:

प्रभू, आम्हीं ऐकलेल्या वार्तेवर कोणीं विश्वास ठेविला
आहे?

परमेश्वराचा भुज कोणास प्रगट झाला आहे?

३९ यामुळें त्यांच्यानें विश्वास ठेववेना; यशया आणखी
म्हणाला:

४० त्यांनीं डोळ्यांनीं पाहूं नये, अंतःकरणानें समजूं नये,
वळूं नये व मीं त्यांस बरें करूं नये, म्हणून त्यानें त्यांचे
डोळे अंधळे केले व त्यांचें अंतःकरण कठीण केलें आहे.

४१ यशयानें त्याचें गौरव पाहिलें म्हणून असें म्हटलें,
आणि तो त्याजविषयीं बोलला. ४२ असें असूनहि अधि-
काऱ्यांतून देखील पुष्कळ जणांनीं त्याजवर विश्वास ठेविला,
परंतु आपण सभाबहिष्कृत होऊं नये म्हणून परूश्यांमुळें
त्यांनीं हें कबूल केलें नाहीं; ४३ कारण त्यांस देवाकडील
गौरवापेक्षां मानवाकडील गौरव अधिक आवडलें.

## येशूच्या सार्वजनिक शिक्षणाचा सारांश

४४ तेव्हां येशू उच्च स्वरानें म्हणाला, जो मजवर
विश्वास ठेवितो तो मजवर विश्वास ठेवीत नाहीं, तर ज्यानें
मला पाठविलें त्याजवर ठेवितो; ४५ आणि जो मला
पाहतो तो, ज्यानें मला पाठविलें त्याला पाहतो. ४६ मी
जगांत प्रकाश असा आलों आहें; यासाठीं कीं मजवर
विश्वास ठेवणाऱ्या कोणीहि अंधारांत राहूं नये. ४७ माझीं
वचनें ऐकून कोणी पाळीत नाहीं तर त्याचा न्याय मी
करीत नाहीं; कारण मी जगाचा न्याय करण्यासाठीं नाहीं;
तर जगाचें तारण करण्यासाठीं आलों. ४८ जो मला अव्हे-
रितो व माझ्या वचनांचा स्वीकार करीत नाहीं त्याचा
न्याय करणारा एक जण आहे; जें वचन मीं सांगितलें
तेंच शेवटल्या दिवशीं त्याचा न्याय करील. ४९ कारण
मी आपल्या मनचें बोललों नाहीं, तर मीं काय सांगावें
व काय बोलावें याविषयीं ज्या पित्यानें मला पाठविलें
त्यानेंच मला आज्ञा दिली आहे. ५० त्याची आज्ञा सार्व-
कालिक जीवन आहे हें मला ठाऊक आहे; यास्तव जें
कांहीं मी बोलतों तें पित्यानें मला सांगितल्याप्रमाणें
बोलतों.

## येशू शिष्यांचे पाय धुतो

**१३** १ वल्हांडण सणापूर्वी, या जगांतून पित्याकडे
जाण्याची आपली वेळ आली आहे हें येशूनें
जाणिलें; आणि ह्या जगांतील स्वकीयांवर त्याचें
प्रेम होतें तें त्यानें शेवटपर्यंत केलें. २ शिमोनाचा पुत्र
यहूदा इस्कर्योत याच्या मनांत त्याला धरून द्यावें असें
सैतान घालून चुकला होता; ३ तेव्हां आपल्या हातीं
पित्यानें अवघें दिलें आहे, आपण देवापासून आलों व
देवाकडे जातों, हें जाणून भोजन होतेवेळीं ४ येशू भोज-
नावरून उठला; त्यानें आपलीं बाह्य वस्त्रें काढून ठेविलीं;
आणि रुमाल घेऊन कमरेस बांधिला. ५ मग तो गंगाळांत
पाणी ओतून शिष्यांचे पाय धुऊं लागला, आणि कमरेस
बांधिलेल्या रुमालानें ते पुसूं लागला. ६ तो शिमोन पेत्रा-
कडे आला, तेव्हां तो त्याला म्हणाला, प्रभुजी, आपण
माझे पाय धुतां काय? ७ येशूनें त्याला उत्तर दिलें, मी
करितों तें तुला आतां कळत नाहीं; तें पुढें कळेल. ८ पेत्र
त्याला म्हणाला, आपणाला माझे पाय कधींहि धुवावयाचे
नाहींत. येशूनें त्याला उत्तर दिलें, मीं तुला न धुतलें तर
माझ्याबरोबर तुला वांटा नाहीं. ९ शिमोन पेत्र त्याला
म्हणाला, प्रभुजी, माझे केवळ पायच धुऊं नका, तर हात
व डोकेंहि धुवा. १० येशूनें त्याला म्हटलें, ज्याचें स्नान
झालें आहे त्याला पायांखेरीज दुसरें कांहीं धुण्याची गरज
नाहीं, तो सर्वांगीं शुद्ध आहे; आणि तुम्ही शुद्ध आहां, तरी
सर्वच नाहीं. ११ कारण आपणास धरून देणारा इसम
त्याला ठाऊक होता; यास्तव तो म्हणाला, तुम्ही सर्वच
शुद्ध नाहीं.

१२ मग त्यांचे पाय धुतल्यानंतर, आपलीं वस्त्रें चढ-
वून पुनः बसल्यावर त्यानें त्यांस म्हटलें, मीं तुम्हांस काय
केलें हें तुम्ही समजलां काय? १३ तुम्हीं मला गुरु व
प्रभु असें संबोधन देतां, आणि तें ठीक देतां; कारण मी
तसाच आहें. १४ यास्तव जो मी प्रभु व गुरु, त्या मीं तुमचे
पाय धुतले तर तुम्हींहि एकमेकांचे पाय धुतले पाहिजेत.
१५ कारण जसें मीं तुम्हांस केलें तसें तुम्हींहि करावें
म्हणून तुम्हांस कित्ता घालून दिला आहे. १६ मी तुम्हांस
खचीत खचीत सांगतों, दास आपल्या धन्यापेक्षां थोर
नाहीं; आणि पाठविलेला पाठविणाऱ्यापेक्षां थोर नाहीं; १७
या गोष्टी तुम्ही समजूनउमजून कराल तर तुम्ही धन्य
आहां. १८ मी तुम्हां सर्वांविषयीं बोलत नाहीं; जे मीं
निवडिले ते मला माहीत आहेत; तरी 'जो माझी भाकर
खातो त्यानें मजवर आपली टाच उचलली आहे,' असा
जो शास्त्रलेख आहे तो पूर्ण झाला पाहिजे. १९ हें मी
तुम्हांस आतां म्हणजे हें होण्यापूर्वी सांगतों, यासाठीं कीं
जेव्हां हें होईल तेव्हां तुम्हीं विश्वास धरावा कीं मी तो
आहें. २० मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों कीं मी
पाठवितों त्याचा जो स्वीकार करितो तो माझा स्वीकार

करतो, आणि जो मला स्वीकारितो तो, ज्यानें मला पाठविलें, त्याला स्वीकारितो.

### आपला विश्वासघात करणाऱ्याला येशू दाखवितो

२१ असें बोलल्यावर येशू आत्म्यांत व्याकुल झाला व निश्चितार्थानें म्हणाला, मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों, तुम्हांतील एक जण मला धरून देईल. २२ तो कोणाविषयीं बोलतो अशा संशयानें शिष्य एकमेकांकडे पाहूं लागले. २३ तेव्हां ज्याच्यावर येशूची प्रीति होती असा त्याच्या शिष्यांतील एक जण येशूच्या उराशीं टेकलेला होता. २४ यास्तव ज्याविषयीं तो बोलतो तो कोण आहे हें आम्हांस सांग, असें शिमोन पेत्रानें त्याला खुणावून म्हटलें. २५ तेव्हां तो तसाच येशूच्या उराशीं टेकलेला असतां मागें लवून त्याला म्हणाला, प्रभुजी, तो कोण आहे? २६ येशूनें उत्तर दिलें; ज्याला मी घास बुचकळून देईन तोच तो आहे. मग त्यानें घास बुचकळून शिमोनाचा पुत्र यहूदा इस्कर्योत याला दिला. २७ आणि घास दिल्यावर सैतान त्याजमध्यें शिरला. मग येशूनें त्याला म्हटलें, जें तूं करणार तें लवकर कर. २८ त्यानें त्याला असें कशासाठीं सांगितलें हें भोजनास बसलेल्यांतील कोणाला समजलें नाहीं. २९ यहूदाजवळ डबी होती, यास्तव सणासाठीं आपणांस ज्या पदार्थाची गरज आहे ते विकत घ्यावे, किंवा गरिबांस कांहीं द्यावें म्हणून येशूनें सांगितलें असेल, असें कित्येकांस वाटलें. ३० मग घास घेतल्यावर तो लागलाच बाहेर गेला; त्या वेळीं रात्र होती.

### प्रेमविषयक नवीन आज्ञा

३१ तो बाहेर गेल्यावर येशूनें म्हटलें, आतां मनुष्याच्या पुत्राचें गौरव झालें आहे आणि त्याच्याठायीं देवाचें गौरव झालें आहे; ३२ देव आपल्या ठायीं त्याचें गौरव करील; तो त्याचें लवकर गौरव करील. ३३ अहो मुलांनो, मी अजून थोडा वेळ तुम्हांबरोबर आहें. तुम्ही माझा शोध कराल; आणि जसें मी यहूद्यांस सांगितलें कीं जेथें मी जातों तेथें तुमच्यानें येववत नाहीं, तसें तें तुम्हांसहि आतां सांगतों. ३४ मी तुम्हांस नवी आज्ञा देतों कीं तुम्हीं एकमेकांवर प्रीति करावी; जशी मीं तुम्हांवर प्रीति केली तशी तुम्हींहि एकमेकांवर प्रीति करावी. ३५ तुमची एकमेकांवर प्रीति असली म्हणजे त्यावरून सर्व ओळखतील कीं तुम्ही माझे शिष्य आहां.

### पेत्र आपला इनकार करणार हें येशू आधींच सांगतो

३६ शिमोन पेत्र त्याला म्हणाला, प्रभुजी, आपण कोठें जातां? येशूनें उत्तर दिलें, जेथें मी जातों तेथें आतां तुझ्यानें माझ्यामागें येववणार नाहीं; तरी त्यानंतर येशील. ३७ पेत्र त्याला म्हणाला, प्रभुजी, माझ्यानें आपल्यामागें आताच कां येववणार नाहीं? मी आपणासाठीं आपला जीव देईन. ३८ येशूनें त्याला उत्तर दिलें, काय, माझ्यासाठीं तूं आपला जीव देशील? मी तुला खचीत खचीत सांगतों, तूं तीन वेळां मला नाकारीपर्यंत कोंबडा आरवणार नाहीं.

### पित्याकडे जाण्याचा मार्ग

१४ १ तुमचें अंतःकरण अस्वस्थ होऊं नये; देवावर विश्वास ठेवा, आणि मजवरहि विश्वास ठेवा. २ माझ्या पित्याच्या घरांत राहण्याच्या जागा पुष्कळ आहेत; नसत्या तर मीं तुम्हांस सांगितलें असतें; मी तुम्हांसाठीं जागा तयार करावयास जातों; ३ आणि मी जाऊन तुम्हांसाठीं जागा तयार केली म्हणजे पुनः येऊन तुम्हांस आपल्याजवळ घेईन; यासाठीं कीं जेथें मी आहें तेथें तुम्हींहि असावें. ४ मी जातों तिकडचा मार्ग तुम्हांस ठाऊक आहे. ५ थोमा त्याला म्हणाला, प्रभो, आपण कोठें जातां हें आम्हांस ठाऊक नाहीं; मग आम्हांस मार्ग कसा ठाऊक असणार? ६ येशूनें त्याला म्हटलें, मार्ग, सत्य, व जीवन मीच आहें; माझ्याद्वारें आल्यावांचून पित्याजवळ कोणी जात नाहीं. ७ मी कोण आहें हें तुम्हीं ओळखलें असतें तर माझ्या पित्यालाहि ओळखलें असतें; एथून पुढें तुम्ही त्याला ओळखतां व तुम्हीं त्याला पाहिलेंहि आहे. ८ फिलिप्प त्याला म्हणाला, प्रभो, पिता आम्हांला दाखवा म्हणजे आम्हांस पुरे आहे. ९ येशूनें त्याला म्हटलें, फिलिप्पा, मी इतका काळ तुम्हांजवळ असून तूं मला ओळखत

नाहींस काय ? ज्यानें मला पाहिलें आहे त्यानें
पित्याला पाहिलें आहे; तर पिता आम्हांस दाखवा
हें तूं कसें म्हणतोस ? १० मी पित्यामध्यें व पिता
मजमध्यें आहे असा विश्वास तूं धरीत नाहींस काय ? ज्या
गोष्टी मी तुम्हांस सांगतों त्या मी आपल्या मनच्या सांगत
नाहीं; तर मजमध्यें राहणारा पिता स्वतःचीं कार्यें
करितो. ११ मी पित्यामध्यें व पिता मजमध्यें असतो,
हें माझें खरें माना; नाहींतर माझ्या कृत्यांमुळें तरी
माझें खरें माना. १२ मी तुम्हांस खचीत खचीत
सांगतों, मी जीं कृत्यें करितों तीं मजवर विश्वास
ठेवणाराहि करील, आणि त्यांपेक्षां मोठीं करील, कारण
मी पित्याकडे जातों. १३ तुम्ही जें कांहीं माझ्या
नामानें मागाल तें मी करीन, यासाठीं कीं पुत्राच्या
ठायीं पित्याचें गौरव व्हावें. १४ तुम्ही माझ्या नामानें
मजजवळ कांहीं मागाल तर मी तें करीन.

### पवित्र आत्मा मिळण्याबद्दल वचन

१५ मजवर तुमची प्रीति असली तर माझ्या आज्ञा
पाळाल. १६ मी पित्याला विनंति करीन, मग तो तुम्हांस दुसरा
कैवारी म्हणजे सत्याचा आत्मा देईल; त्यानें तुम्हांबरोबर
सदासर्वदा राहावें म्हणून. १७ त्याला जगाच्यानें ग्रहण
करवत नाहीं, कारण तें त्याला पाहत नाहीं, अगर त्याला
ओळखीत नाहीं; तुम्ही त्याला ओळखतां, कारण तो
तुम्हांबरोबर राहतो व तुम्हांमध्यें वस्ती करील. १८ मी
तुम्हांस अनाथ असे सोडणार नाहीं; तुम्हांकडे येईन. १९
आतां थोडाच वेळ आहे, मग जग मला आणखी पाहणार
नाहीं; तरी तुम्ही मला पाहाल; कारण मीं जीवंत आहें
आणि तुम्हीहि जीवंत राहाल. २० त्या दिवशीं तुम्हांस
समजेल कीं मी आपल्या पित्यामध्यें, तुम्ही मजमध्यें व मी
तुम्हांमध्यें आहें. २१ ज्याच्याजवळ माझ्या आज्ञा आहेत,
व त्या जो पाळतो तोच मजवर प्रीति करणारा आहे; आणि
जो मजवर प्रीति करितो त्याजवर माझा पिता प्रीति करील;
मीहि त्याजवर प्रीति करीन व स्वतः त्याला व्यक्त होईन.
२२ यहूदा ( इस्कर्योत नव्हे ) त्याला म्हणाला, प्रभो, असें
काय झालें कीं आपण स्वतः आम्हांस व्यक्त होणार आणि
जगाला व्यक्त होणार नाहीं ? २३ येशूनें त्याला उत्तर दिलें,
कोणाचें मजवर प्रेम असेल तर तो माझें वचन पाळील
आणि माझा पिता त्याजवर प्रेम करील, आणि आम्ही
त्याजकडे येऊन त्याजबरोबर वस्ती करूं. २४ मजवर
कोणाचें प्रेम नसल्यास तो माझीं वचनें पाळीत नाहीं; जें
वचन तुम्ही ऐकतां तें माझें नव्हे, तर ज्या पित्यानें मला
पाठविलें त्याचें आहे.

२५ मी तुम्हांजवळ राहत असतांना तुम्हांस या गोष्टी
सांगितल्या आहेत. २६ तरी ज्याला पिता माझ्या नामानें
पाठवील तो कैवारी म्हणजे पवित्र आत्मा तुम्हांस सर्व
शिकवील आणि ज्या गोष्टी मीं तुम्हांस सांगितल्या त्या
सर्वांची तुम्हांस आठवण देईल. २७ मी तुम्हांस शांति
देऊन ठेवितों; आपली शांति तुम्हांस देतों; जसें जग देतें
तसें मी तुम्हांस देत नाहीं. तुमचें अंतःकरण अस्वस्थ अगर
भयभीत होऊं नये. २८ मी जातों आणि तुम्हांकडे येईन,
असें जें मीं तुम्हांस सांगितलें तें तुम्हीं ऐकलें. मजवर
तुमची प्रीति असती तर मी पित्याकडे जातों म्हणून
तुम्हांला आनंद वाटला असता; कारण माझा पिता मजपेक्षां
थोर आहे. २९ तें होईल तेव्हां तुम्हीं विश्वास धरावा,
म्हणून तें होण्यापूर्वी आतां मीं तुम्हांस सांगितलें आहे.
३० यापुढें मी तुम्हांबरोबर फार बोलणार नाहीं, कारण
जगाचा अधिकारी येतो; तरी मजमध्यें त्याचें कांहीं नाहीं.
३१ परंतु मीं पित्यावर प्रीति करितों आणि पित्यानें जशी
मला आज्ञा दिली तसें करितों, हें जगानें ओळखावें म्हणून
असें होतें. उठा, आपण येथून जाऊं.

### द्राक्षवेल आणि शाखा

१५ १ मी खरा द्राक्षवेल आहें आणि माझा बाप
माळी आहे. २ माझ्यांतील फळ न देणारा
प्रत्येक फाटा तो काढून टाकितो; आणि फळ
देणाऱ्या फाट्याला अधिक फळ यावें म्हणून तो त्या
प्रत्येकाला साफसूफ करितो. ३ जें वचन मीं तुम्हांस सांगि-
तलें त्यामुळें तुम्ही आतां शुद्ध झालांच आहां. ४ तुम्ही
मजमध्यें राहा, आणि मी तुम्हांमध्यें राहतों. जसें फाटा
वेलांत राहिल्यावांचून त्याच्यानें आपल्याआपण फळ देव-
वत नाहीं तसें मजमध्यें राहिल्यावांचून तुम्हांलाहि देतां
येणार नाहीं. ५ मी वेल आहें, तुम्ही फाटे आहां; जो

मजमध्यें राहतो आणि मी त्याजमध्यें राहतों तो पुष्कळ फळ देतो; कारण मजपासून वेगळे असल्यास तुम्हांला कांहीं करितां येत नाहीं. ६ कोणी मजमध्यें राहिला नाहीं तर त्याला फाट्याप्रमाणें बाहेर टाकितात, व तो वाळून जातो; मग त्यास गोळा करून अग्नींत टाकितात व ते जळून जातात. ७ तुम्ही मजमध्यें राहिलां व माझीं वचनें तुम्हांमध्यें राहिलीं तर जें कांहीं तुम्हांस पाहिजे असेल तें मागा म्हणजे तें तुम्हांस प्राप्त होईल. ८ तुम्हीं विपुल फळ दिल्यानें पित्याचें गौरव होतें; आणि तुम्ही माझे शिष्य व्हाल. ९ जशी पित्यानें मजवर प्रीति केली तशी मींहि तुम्हांवर प्रीति केली आहे; तुम्ही माझ्या प्रीतींत राहा. १० जसा मी आपल्या पित्याच्या आज्ञा पाळून त्याच्या प्रीतींत राहतों तसे तुम्ही माझ्या आज्ञा पाळाल तर माझ्या प्रीतींत राहाल. ११ माझा आनंद तुम्हांमध्यें असावा व तुमचा आनंद परिपूर्ण व्हावा म्हणून मीं तुम्हांस या गोष्टी सांगितल्या आहेत. १२ जशी मीं तुम्हांवर प्रीति केली तशी तुम्हीं एकमेकांवर प्रीति करावी अशी माझी आज्ञा आहे. १३ आपल्या मित्रां-करितां आपला प्राण द्यावा यापेक्षां कोणाची प्रीति मोठी नाहीं. १४ मी तुम्हांस जें कांहीं सांगतों तें तुम्ही कराल तर तुम्ही माझे मित्र आहां. १५ मी आतांपासून तुम्हांस दास म्हणत नाहीं; कारण धनी काय करितो तें दासाला ठाऊक नसतें; परंतु मीं तुम्हांस मित्र म्हटलें आहे; कारण जें कांहीं मीं आपल्या पित्यापासून ऐकून घेतलें तें सर्व मीं तुम्हांस कळविलें आहे. १६ तुम्हीं मला निवडिलें नाहीं, तर मीं तुम्हांस निवडिलें व तुम्हांस नेमिलें आहे, यांत हेतु हा कीं तुम्हीं जाऊन फळ द्यावें व तुमचें फळ टिकावें; आणि जें कांहीं तुम्ही माझ्या नामानें पित्याजवळ मागाल तें त्यानें तुम्हांस द्यावें.

### जग व सत्याचा आत्मा

१७ तुम्हीं एकमेकांवर प्रीति करावी म्हणून मी तुम्हांस ह्या आज्ञा करितों. १८ जग तुमचा द्वेष करितें, तर तुमचा द्वेष करण्यापूर्वी त्यानें माझाहि केला हें तुम्हांस माहीत आहे. १९ तुम्ही जगाचे असतां तर जगानें स्वकीयांवर प्रीति केली असती; परंतु तुम्ही जगाचे नाहीं; मीं तुम्हांस जगांतून निवडिलें आहे, म्हणून जग तुमचा द्वेष करितें. २० दास धन्यापेक्षां मोठा नाहीं असें जें वचन मीं तुम्हांस सांगितलें त्याची आठवण करा. ते माझ्या पाठीस लागले तर तुमच्याहि पाठीस लागतील; त्यांनीं माझें वचन पाळिलें तर तुमचेंहि पाळितील; २१ परंतु ते माझ्या नामाकरितां हें सर्व तुम्हांला करितील, कारण ज्यानें मला पाठविलें त्यास ते ओळखीत नाहींत. २२ मी आलों नसतों व त्यांच्याबरोबर बोललों नसतों तर त्यांच्याकडे पाप नसतें; परंतु आतां त्यांस आपल्या पापाविषयीं निमित्त सांगतां येत नाहीं. २३ जो माझा द्वेष करितो तो माझ्या पित्याचाहि द्वेष करितो. २४ जीं कामें दुसऱ्या कोणीं केलीं नाहींत तीं मीं त्यांच्यामध्यें केलीं नसतीं तर त्यांच्याकडे पाप नसतें, परंतु आतां त्यांनीं मला व माझ्या पित्यालाहि पाहिलें आहे व आमचा द्वेष केला आहे. २५ तथापि 'विनाकारण त्यांनीं माझा द्वेष केला' असें जें वचन त्यांच्या शास्त्रांत लिहिलें आहे तें पूर्ण व्हावें म्हणून हें असें होतें; २६ परंतु जो पित्यापासून निघतो, ज्याला मी पित्यापासून तुम्हांकडे पाठवीन असा कैवारी म्हणजे सत्याचा आत्मा येईल तेव्हां तो मजविषयीं साक्ष देईल; २७ आणि तुम्हींहि साक्ष द्याल, कारण आरंभापासून तुम्हीं मजबरोबर असत आलां आहां.

**१६** १ तुम्हीं अडखळूं नये म्हणून मीं तुम्हांस या गोष्टी सांगितल्या आहेत. २ ते तुम्हांस सभाबहिष्कृत करितील; इतकेंच नाहीं तर अशी वेळ येत आहे कीं जो कोणी तुमचा जीव घेईल त्याला आपण देवाला सेवा अर्पण करितों असें वाटेल. ३ ते असें करितील, कारण त्यांनीं पित्याला व मलाहि ओळखिलें नाहीं. ४ मीं तुम्हांस ह्या गोष्टी अशासाठीं सांगितल्या कीं त्यांची वेळ आली म्हणजे त्या मीं तुम्हांस सांगितल्याची आठवण व्हावी. ह्या गोष्टी मीं प्रारंभापासून तुम्हांस सांगितल्या नाहींत; कारण मी तुम्हांबरोबर होतों; ५ परंतु ज्यानें मला पाठविलें त्याजकडे मी आतां जातों; आणि तुम्ही कोठें जातां असें तुम्हांतील कोणी मला विचारीत नाहीं, ६ या गोष्टी मीं तुम्हांस सांगितल्या आहेत म्हणून तुमचें अंतः-करण खेदानें भरलें आहे. ७ तरी मी तुम्हांस खरी गोष्ट सांगतों; मीं जावें हें तुम्हांस हितकारक आहे; मी न गेलों

तर कैवारी तुम्हांकडे येणार नाहीं; मी गेलों तर त्याला
तुम्हांकडे पाठवीन. ८ तो येऊन पापाविषयीं, धार्मिकते-
विषयीं व न्यायनिवाड्याविषयीं जगाची खातरी करील. ९ ते
मजवर विश्वास ठेवीत नाहींत यावरून पापाविषयीं; १०
मी पित्याकडे जातों आणि पुढें तुम्हांस मी दिसणार नाहीं
यावरून धार्मिकतेविषयीं; ११ आणि या जगाच्या अधि-
काऱ्याचा न्याय केला आहे यावरून न्यायनिवाड्याविषयीं.
१२ मला अद्यापि बहुत गोष्टी तुम्हांस सांगावयाच्या आहेत,
परंतु आतां तुमच्यानें त्या सोसवणार नाहींत; १३ तरी तो
सत्याचा आत्मा येईल तेव्हां तो तुम्हांस मार्ग दाखवून सर्व
सत्यांत नेईल; कारण तो आपल्या स्वतःचें सांगणार नाहीं;
तर जें कांहीं ऐकेल, तेंच सांगेल, आणि होणाऱ्या गोष्टी
तुम्हांस विदित करील. १४ तो माझें गौरव करील; कारण
जें माझें आहे त्यांतून घेऊन तें तुम्हांस विदित करील. १५
जें कांहीं पित्याचें आहे तें सर्व माझें आहे; म्हणून मी
म्हणालों कीं जें माझें आहे त्यांतून घेऊन तें तुम्हांस विदित
करील.

## वियोगसमयींचे उद्गार

१६ थोडक्या वेळानें तुम्ही मला पाहणार नाहीं; आणि
पुनः थोडक्या वेळानें तुम्ही मला पाहाल. १७ यावरून
त्याच्या शिष्यांपैकीं कित्येक एकमेकांस म्हणाले, हा आम्हांस
म्हणतो, थोडक्या वेळानें तुम्ही मला पाहणार नाहीं आणि
पुनः थोडक्या वेळानें तुम्ही मला पाहाल; त्याचें कारण मी
पित्याकडे जातों : असें जें तो आम्हांस म्हणतो तें काय ?
१८ ते म्हणाले, थोडक्या वेळानें असें जें हा म्हणतो तें
काय ? तो काय म्हणतो हें आम्हांस समजत नाहीं. १९
आपणाला विचारावें असें त्यांच्या मनांत आहे हें ओळखून
येशूनें त्यांस म्हटलें, थोडक्या वेळानें तुम्ही मला पाहणार
नाहीं आणि पुनः थोडक्या वेळानें तुम्ही मला पाहाल, हें
जें मी म्हणालों त्याविषयीं तुम्ही एकमेकांस विचारितां काय ?
२० मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों कीं तुम्ही रडाल व
शोक कराल तरी जग आनंद करील; तुम्हांला दुःख होईल,
तरी तुमच्या दुःखाचा आनंद होईल. २१ स्त्री प्रसूत होते
तेव्हां तिला दुःख होतें, कारण तिची घटका आलेली असते;
परंतु बालक जन्मल्यावर मनुष्य जगांत जन्मल्याचा जो
आनंद होतो त्यामुळें तिला त्या क्लेशाची आठवण होत
नाहीं. २२ याप्रमाणें तुम्हांस आतां दुःख झालें आहे; तरी
मी तुम्हांस पुनः पाहीन, आणि तुमचें अंतःकरण आनंदित
होईल; तुमचा आनंद तुम्हांपासून कोणी काढून घेणार
नाहीं. २३ त्या दिवशीं तुम्ही माझ्याजवळ कांहीं मागणार
नाहीं. मी तुम्हांस खचीत खचीत सांगतों कीं तुम्ही पित्या-
जवळ कांहीं मागाल तें तो तुम्हांस माझ्या नांवानें देईल.
२४ तुम्हीं अजून माझ्या नांवानें कांहीं मागितलें नाहीं;
मागा म्हणजे तुम्हांस मिळेल, यासाठीं कीं तुमचा आनंद
परिपूर्ण व्हावा.

२५ या गोष्टी मीं तुम्हांस दृष्टांतरूपानें सांगितल्या
आहेत; मी तुम्हांबरोबर दृष्टांतरूपानें आणखी बोलणार
नाहीं, तर पित्याविषयीं तुम्हांस उघड सांगेन अशी
घटका येत आहे. २६ त्या दिवशीं तुम्ही माझ्या
नांवानें मागाल; आणि मी तुम्हांसाठीं पित्याजवळ
विनंति करीन, असें मी तुम्हांस म्हणत नाहीं; २७
कारण पिता स्वतः तुम्हांवर प्रीति करितो, कारण
तुम्हीं मजवर प्रीति केली आहे, आणि मी पित्या-
पासून आलों असा विश्वास धरिला आहे. २८ मी
पित्यापासून निघून जगांत आलों आहें; पुनः जग
सोडून पित्याकडे जातों. २९ त्याचे शिष्य म्हणाले,
पाहा, आतां आपण उघड बोलतां, कांहीं दृष्टांत सांगत
नाहीं. ३० आतां आम्हांस कळलें कीं आपणाला
सर्व ठाऊक आहे, म्हणून कोणीं आपणाजवळ मागावें
अशी आपल्याला गरज नाहीं; यावरून आपण देवा-
पासून आलां असा आम्ही विश्वास धरितों. ३१ येशूनें
त्यांस उत्तर दिलें, आतां तुम्ही विश्वास धरितां काय ?
३२ पाहा, अशी घटका येते, किंबहुना आली आहे
कीं तुमची दाणादाण होऊन तुम्ही सर्व आपापल्या घरीं
जाल व मला एकटें सोडाल; तरी मी एकटा नाहीं,
कारण पिता मजबरोबर आहे. ३३ या गोष्टी मीं
तुम्हांस अशासाठीं सांगितल्या आहेत कीं माझ्या ठायीं
तुम्हांस शांति मिळावी. जगांत तुम्हांस क्लेश होतील
तरी धीर धरा; मीं जगाला जिंकिलें आहे.

## येशूची प्रार्थना

१ या गोष्टी बोलल्यावर येशूनें वर आका-
१७ शाकडे दृष्टि लावून म्हटलें, हे पित्या, वेळ
आली आहे; पुत्रानें तुझें गौरव करावें म्हणून
तूं आपल्या पुत्राचें गौरव कर; २ जे तूं त्याला
दिले आहेत त्या सर्वांस त्यानें सार्वकालिक जीवन द्यावें,
यासाठीं तूं मनुष्यमात्रावर त्याला अधिकार दिलाच
आहे. ३ सार्वकालिक जीवन हेंच आहे कीं त्यांनीं,
जो तूं एकच सत्य देव त्या तुला, व ज्याला तूं
पाठविलें, त्या येशू ख्रिस्ताला ओळखावें. ४ जें काम
तूं मला करावयास दिलें तें समाप्त करून मीं पृथ्वीवर
तुझें गौरव केलें आहे. ५ तर आतां हे पित्या, जग
होण्यापूर्वी जें माझें गौरव तुझ्याजवळ होतें त्याच्या-
योगें तूं आपणाजवळ माझें गौरव कर. ६ जीं मनुष्यें
जगांतून तूं मला दिलीं त्यांस मीं तुझें नाम प्रगट
केलें; ते तुझे होते आणि तूं ते मला दिले; आणि
त्यांनीं तुझें वचन पाळिलें आहे. ७ आतां त्यांस
समजलें आहे कीं जें कांहीं तूं मला दिलें आहे तें
सर्व तुजपासून आहे. ८ कारण जीं वचनें तूं मला
दिलीं तीं मीं त्यांस दिलीं आहेत; त्यांनीं तीं घेतलीं,
मी तुजपासून आलों हें त्यांनीं खरोखर ओळखिलें
आणि तूं मला पाठविलें असा त्यांनीं विश्वास धरिला.
९ त्यांजसाठीं मी विनंति करितों; मी जगासाठीं
विनंति करीत नाहीं, तर जे तूं मला दिले आहेत
त्यांजसाठीं; कारण ते तुझे आहेत. १० जें माझें तें
सर्व तुझें आहे, आणि जें तुझें तें माझें आहे;
आणि त्यांच्याठायीं माझें गौरव झालें आहे. ११
यापुढें मी जगांत नाहीं, ते जगांत आहेत; मी
तुजकडे येतों. हे पवित्र पित्या, तूं मला दिलेल्या
आपल्या नामांत त्यांस राख, यासाठीं कीं जसें आपण
एक आहों तसें त्यांनीं एक व्हावें. १२ जोंपर्यंत मी
त्यांजबरोबर होतों तोंपर्यंत तूं मला दिलेल्या आपल्या
नामांत मीं त्यांस राखिलें; मीं त्यांचा संभाळ केला,
आणि नाशाच्या पुत्राशिवाय त्यांच्यांतून कोणाचा नाश
झाला नाहीं; यासाठीं कीं शास्त्रलेख पूर्ण व्हावा; १३
पण आतां मी तुजकडे येतों; आणि त्यांच्याठायीं माझा
आनंद परिपूर्ण व्हावा म्हणून मी जगांत या गोष्टी
सांगतों. १४ मीं तुझें वचन त्यांस दिलें आहे; जगानें
त्यांचा द्वेष केला; कारण जसा मी जगाचा नाहीं
तसे तेहि जगाचे नाहींत. १५ तूं त्यांस जगांतून
काढून घ्यावें अशी मी विनंति करीत नाहीं, तर तूं
त्यांस वाइटापासून राखावें अशी विनंति करितों. १६
जसा मी जगाचा नाहीं तसे तेहि जगाचे नाहींत.
१७ तूं सत्यांत त्यांस पवित्र कर; तुझें वचन हेंच
सत्य आहे. १८ जसें तूं मला जगांत पाठविलें तसें
मींहि त्यांस जगांत पाठविलें. १९ मी त्यांच्यासाठीं
स्वतःला अर्पून पवित्र करितों, यासाठीं कीं त्यांनींहि
खरें खरें पवित्र व्हावें. २० मी त्यांच्यासाठीं केवळ
नाहीं, तर त्यांच्या वचनावरून जे मजवर विश्वास ठेवि-
तात त्यांच्यासाठींहि विनंति करितों; २१ यासाठीं कीं
त्या सर्वांनीं एक व्हावें; हे पित्या, जसा तूं मजमध्यें
व मी तुजमध्यें तसें त्यांनींहि आम्हांमध्यें व्हावें,
यासाठीं कीं तूं मला पाठविलें असा विश्वास जगानें
धरावा. २२ तूं जें गौरव मला दिलें आहे तें मीं
त्यांस दिलें आहे, यासाठीं कीं जसें आपण एक आहों
तसें त्यांनींहि एक व्हावें; २३ म्हणजे मी त्यांजमध्यें
व तूं मजमध्यें; यासाठीं कीं त्यांनीं एक होऊन पूर्ण
व्हावें आणि त्यावरून जगानें समजून घ्यावें कीं तूं
मला पाठविलें, आणि जशी तूं मजवर प्रीति केली
तशी त्यांजवरहि प्रीति केली. २४ हे पित्या, माझी
अशी इच्छा आहे कीं तूं जे मला दिलेले आहेत
त्यांनींहि जेथें मी आहें तेथें मजजवळ असावें; यासाठीं
कीं जें माझें गौरव तूं मला दिलें आहे तें त्यांनीं
पाहावें; कारण जगाच्या स्थापनेपूर्वी तूं मजवर प्रीति
केली. २५ हे न्यायसंपन्न पित्या, जगानें तुला ओळखिलें
नाहीं, मीं तुला ओळखिलें; आणि तूं मला पाठविलें असें
ह्यांनीं ओळखिलें. २६ मीं तुझें नाम त्यांस कळविलें आणि
कळवीन; यासाठीं कीं जी प्रीति तूं मजवर केली ती
त्यांजमध्यें असावी आणि मीं त्यांजमध्यें असावें.

## येशूला अटक करतात

१ हें बोलल्यावर येशू आपल्या शिष्यां-
१८ सुद्धां किद्रोन ओहळाच्या पलीकडे गेला, तेथें
बाग होता, त्यांत तो व त्याचे शिष्य गेले.
२ ही जागा त्याला धरून देणारा यहूदा यालाहि
ठाऊक होती; कारण येशू आपल्या शिष्यांसहित
तेथें वारंवार जात असे. ३ तेव्हां मुख्य याजक व परूशी
यांजपासून पलटण व शिपाई मिळाल्यावर यहूदा फाणस,
मशाली व हत्यारें घेऊन तेथें आला. ४ येशू आपणावर
जें कांहीं येणार तें सर्व जाणून बाहेर आला आणि त्यांस
म्हणाला, तुम्ही कोणाचा शोध करितां? ५ त्यांनीं त्याला
उत्तर दिलें कीं नासरेथकर येशूचा. तो त्यांस म्हणाला, तो
मी आहें. त्याला धरून देणारा यहूदाहि त्यांच्याबरोबर
उभा होता. ६ तो मी आहें, असें तो म्हणतांच ते मागें
हटून भूमीवर पडले. ७ तेव्हां त्यानें त्यांस पुनः विचारिलें,
कोणाचा शोध करितां? ते म्हणाले, नासरेथकर येशूचा.
८ येशूनें उत्तर दिलें, तो मी आहें असें मी तुम्हांस
सांगितलें, माझा शोध करीत असलां तर यांस जाऊं द्या.
९ जे तूं मला दिले आहेत त्यांतून एकहि मीं हरविला
नाहीं, असें जें वचन तो बोलला तें पूर्ण व्हावें म्हणून हें
झालें. १० शिमोन पेत्राजवळ तरवार होती, ती त्यानें
उपसून प्रमुख याजकाच्या दासावर चालविली आणि त्याचा
उजवा कान कापून टाकिला; त्या दासाचें नांव मल्ख
होतें. ११ येशू पेत्राला म्हणाला, तरवार म्यानांत घाल;
पित्यानें जो प्याला मला दिला तो मीं पिऊं नये काय?
१२ मग पलटण, हजारांचा सरदार व यहूद्यांचे शिपाई
यांनीं येशूला धरून बांधिलें. १३ आणि त्याला प्रथम
हन्नाकडे नेलें; कारण, कयफा जो त्या वर्षी प्रमुख याजक
होता त्याचा हा सासरा होता. १४ एका मनुष्यानें लोकां-
बद्दल मरावें हें हितावह आहे अशी ज्यानें यहूद्यांस मसलत
दिली, तोच हा कयफा होता.

## पेत्र येशूचा इनकार करतो

१५ शिमोन पेत्र व दुसरा एक शिष्य हे येशूच्या मागें
चालले. तो शिष्य प्रमुख याजकाच्या ओळखीचा होता
आणि तो येशूबरोबर प्रमुख याजकाच्या वाड्यांत गेला;
१६ पेत्र दाराजवळ बाहेर उभा राहिला होता. यास्तव
जो दुसरा शिष्य प्रमुख याजकाच्या ओळखीचा होता त्यानें
बाहेर येऊन व द्वारपालिकेला सांगून पेत्राला आंत नेलें.
१७ यावरून ती तरुण द्वारपालिका पेत्राला म्हणाली, तूंहि
त्या माणसाच्या शिष्यांतील आहेस काय? त्यानें म्हटलें,
मी नाहीं. १८ तेव्हां थंडी होती, म्हणून दास व शिपाई
हे कोळशांचा विस्तव पेटवून शेकत उभे राहिले होते;
आणि त्यांच्याबरोबर पेत्रहि उभा राहून शेकत होता.

१९ तेव्हां प्रमुख याजकानें येशूला त्याच्या शिष्यां-
विषयीं व त्याच्या शिकवणीविषयीं विचारिलें. २० येशूनें
त्याला उत्तर दिलें कीं, मी जगासमोर उघड बोललों आहें;
जेथें सभास्थानांत व मंदिरांत सर्व यहूदी मिळतात तेथें
मीं नेहमीं शिक्षण दिलें; गुप्तपणें कांहीं बोललों नाहीं. २१
मला कां विचारितोस? मी काय बोललों हें ज्यांनीं ऐकलें
आहे त्यांस विचार; पाहा, मी जें बोललों तें त्यांस ठाऊक
आहे. २२ त्यानें असें म्हटल्यावर जवळ उभा राहणारा एक
शिपाई येशूला चपडाक मारून म्हणाला, तूं प्रमुख याजकाला
असा जबाब देतोस काय? २३ येशूनें त्याला उत्तर दिलें;
मी वाईट बोललों असलों तर त्या वाइटाविषयीं साक्ष दे,
बरें बोललों असलों तर मला कां मारितोस? २४ तेव्हां
हन्नानें त्याला प्रमुख याजक कयफा याजकडे बांधलेलेंच
पाठविलें.

२५ शिमोन पेत्र शेकत उभा राहिला होता. ते त्याला
म्हणाले, तूंहि त्याच्या शिष्यांतील आहेस काय? तो
नाकारून बोलला; मी नाहीं. २६ मग ज्याचा कान पेत्रानें
कापून टाकिला होता त्याचा एक नातलग प्रमुख याजकाच्या
दासांपैकीं एक होता; तो म्हणाला, मीं तुला त्याच्याबरोबर
बागांत नाहीं का पाहिलें? २७ पेत्रानें पुनः नाकारिलें;
आणि तेव्हांच कोंबडा आरवला.

## रोमी सुभेदार पिलात याजपुढें येशू

२८ नंतर त्यांनीं येशूला कयफाच्या एथून कचेरींत
नेलें; तेव्हां सकाळ होती; आणि आपणांस विटाळ होऊं
नये, वल्हांडणाचें भोजन करितां यावें, म्हणून ते स्वतः
कचेरींत गेले नाहींत; २९ यास्तव पिलात त्यांजकडे बाहेर
येऊन म्हणाला, तुम्ही या मनुष्यावर काय आरोप आणितां?

३० त्यांनीं त्याला उत्तर दिलें, तो दुष्कर्मी नसता तर
आम्हीं त्याला तुमच्या स्वाधीन केलें नसतें. ३१ पिलातानें
त्यांस म्हटलें, तुम्हीच त्याला घेऊन आपल्या शास्त्राप्रमाणें
त्याचा न्याय ठरवा. यहूदी त्याला म्हणाले, कोणाचा जीव
घेण्याचा आम्हांला अधिकार नाहीं; ३२ आपण कोणत्या
मरणानें मरणार हें कळवितांना येशूनें जें वचन सांगितलें
होतें तें पूर्ण व्हावें म्हणून असें झालें.

३३ यास्तव पिलात पुनः कचेरींत गेला, आणि येशूला
बोलावून म्हणाला, तूं यहूद्यांचा राजा आहेस काय ? ३४
येशूनें उत्तर दिलें, तूं आपण होऊन हें म्हणतोस, किंवा
दुसऱ्यांनीं तुला मजविषयीं सांगितलें ? ३५ पिलातानें उत्तर
दिलें, मी यहूदी आहें काय ? तुझ्याच लोकांनीं व मुख्य
याजकांनीं तुला माझ्या स्वाधीन केलें; तूं काय केलेंस ? ३६
येशूनें उत्तर दिलें, माझें राज्य या जगाचें नव्हे; माझें राज्य
या जगाचें असतें तर मीं यहूद्यांच्या स्वाधीन होऊं नये
म्हणून माझ्या शिपायांनीं लढाई केली असती, परंतु माझें
राज्य एथलें नव्हे. ३७ यावरून पिलात त्याला म्हणाला,
तर तूं राजा आहेस काय ? येशूनें उत्तर दिलें कीं मी
राजा आहें असें तूं म्हणतोस. मी यासाठीं जन्मलों आहें
व यासाठीं जगांत आलों आहे कीं मीं सत्याविषयीं साक्ष
द्यावी. जो कोणी सत्याचा आहे तो माझी वाणी ऐकतो.
३८ पिलात त्याला म्हणाला, सत्य काय आहे ?

असें बोलून तो पुनः यहूद्यांकडे बाहेर जाऊन त्यांस
म्हणाला, याच्याठायीं मला कांहीं अपराध दिसत नाहीं. ३९
पण वल्हांडणांत मीं तुम्हांसाठीं एका इसमाला सोडावें
अशी तुमची रीत आहे; म्हणून मीं तुम्हांसाठीं यहूद्यांच्या
राजाला सोडावें अशी तुमची इच्छा आहे काय ? ४०
तेव्हां ते पुनः ओरडून म्हणाले, याला नको, तर बरब्बाला
सोडा. बरब्बा हा एक लुटारू होता.

### पिलात यहूद्यांपुढें दबून जातो

१ नंतर पिलातानें येशूला घेऊन फटके मार-
१९ विले. २ शिपायांनीं कांट्यांचा मुगुट गुंफून त्याच्या
मस्तकावर घातला व जांभळें वस्त्र त्यास पांघरविलें;
३ आणि ते त्याजकडे येऊन म्हणाले, हे यहूद्यांच्या राजा,
तुझा जयजयकार असो ! मग त्यांनीं त्याला चपडाका
मारिल्या. ४ तेव्हां पिलातानें पुनः बाहेर जाऊन त्यांस
म्हटलें, पाहा, त्याच्या ठायीं मला कांहीं अपराध दिसत नाहीं,
हें तुम्हांस कळावें म्हणून मी त्याला तुम्हांकडे बाहेर आणितों.
५ यास्तव येशू कांट्यांचा मुगुट व जांभळें वस्त्र घातलेला
असा बाहेर आला आणि पिलात त्यांस म्हणाला, पाहा
हा मनुष्य ! ६ मुख्य याजक व त्यांचे शिपाई त्याला पाहून
ओरडून म्हणाले, त्याला वधस्तंभाशीं खिळा, वधस्तंभाशीं
खिळा. पिलात त्यांस म्हणाला, तुम्हीच त्याला घेऊन वध-
स्तंभाशीं खिळा कारण मला त्याच्या ठायीं अपराध दिसत
नाहीं. ७ यहूद्यांनीं त्याला उत्तर दिलें, आम्हांस शास्त्र आहे,
आणि त्या शास्त्राप्रमाणें त्यानें मेलें पाहिजे, कारण त्यानें
स्वतःला देवाचा पुत्र केलें. ८ यास्तव पिलात हें बोलणें
ऐकून अधिकच भ्याला; ९ आणि तो पुनः कचेरींत जाऊन
येशूला म्हणाला, तूं कोठला आहेस ? परंतु येशूनें त्याला
उत्तर दिलें नाहीं. १० यास्तव पिलातानें त्याला म्हटलें, तूं
माझ्याबरोबर बोलत नाहींस काय ? तुला सोडण्याचा अधि-
कार मला आहे, व तुला वधस्तंभावर खिळण्याचा अधिकार
मला आहे हें तुला ठाऊक नाहीं काय ? ११ येशूनें उत्तर
दिलें, तुला वरून अधिकार देण्यांत आला नसता तर मज-
वर तो मुळींच चालला नसता; यास्तव ज्यानें मला तुझ्या
स्वाधीन केलें त्याचें पाप अधिक आहे. १२ यावरून
पिलातानें त्यास सोडविण्याची खटपट केली; परंतु यहूदी
आरडाओरड करून म्हणाले, तुम्हीं याला सोडिलें तर
तुम्ही कैसराचे मित्र नाहीं; जो कोणी आपणाला राजा
करितो तो कैसराचा विरोध करितो. १३ हे शब्द ऐकून
पिलातानें येशूला बाहेर आणिलें आणि इब्री भाषेंत गब्बाथा
म्हणजे फरसबंदी ह्या नांवाच्या जागीं तो न्यायासनावर बसला.
१४ तेव्हां वल्हांडणाच्या तयारीचा दिवस असून सुमारें
सहावा तास होता; तेव्हां त्यानें यहूद्यांस म्हटलें, पाहा
तुमचा राजा ! १५ यावरून ते ओरडले, त्याची वाट लावा,
त्याची वाट लावा; त्याला वधस्तंभावर खिळा. पिलात
त्यांस म्हणाला, मीं तुमच्या राजाला वधस्तंभावर खिळावें
काय ? मुख्य याजकांनीं उत्तर दिलें कीं कैसरावांचून
आम्हांस कोणी राजा नाहीं. १६ मग त्यानें त्याला वधस्तं-
भाशीं खिळण्याकरितां त्यांच्या स्वाधीन केलें.

## येशूला वधस्तंभाला खिळणें

१७ त्यांनीं येशूला आपल्या ताब्यांत घेतलें; आणि तो
आपला वधस्तंभ स्वतः वाहत कवटीचें स्थान म्हटलेल्या
जागीं गेला; त्या जागेला इब्री भाषेंत गुलगुथा म्हणतात;
१८ तेथें त्यांनीं त्याला व त्याजबरोबर दुसऱ्या दोघांला,
एकाला एका बाजूस, व एकाला दुसऱ्या बाजूस आणि
येशूला मध्यें, असें वधस्तंभावर खिळिलें. १९ पिलातानें
दोषपत्रकहि लिहून वधस्तंभावर लाविलें; त्यांत **यहूद्यांचा**
**राजा नासोरी येशू** असें लिहिलें होतें, २० येशूला
वधस्तंभाशीं खिळिलें तें स्थळ नगराच्या जवळ होतें,
म्हणून पुष्कळ यहूद्यांनीं तें दोषपत्रक वाचिलें. तें इब्री,
रोमी व हेल्लेणी या भाषांत लिहिलें होतें. २१ यास्तव
यहूद्यांचे मुख्य याजक पिलाताला म्हणाले, यहूद्यांचा राजा
असें लिहूं नका, तर मी यहूद्यांचा राजा आहें असें त्यानें
म्हटलें, असें लिहा. २२ पिलातानें उत्तर दिलें, मीं लिहिलें
तें लिहिलें.

२३ शिपायांनीं येशूला वधस्तंभावर खिळिल्यानंतर
त्याचीं वस्त्रें घेतलीं आणि एकएका शिपायाला एकएक
विभाग असे त्यांचे चार विभाग केले; त्यांनीं अंगरखाहि
घेतला; त्या अंगरख्याला शिवण नसून तो वरपासून खाल-
पर्यंत सबंध विणिलेला होता. २४ यास्तव ते एकमेकांस
म्हणाले, हा आपण फाडूं नये, तर कोणाला मेईल हें चिठ्या
टाकून पाहूं; हें यासाठीं झालें कीं

त्यांनीं माझीं वस्त्रें आपसांत वांटून घेतलीं,
आणि माझ्या पेहरावावर चिठ्या टाकिल्या,

असा जो शास्त्रलेख तो पूर्ण व्हावा. त्याप्रमाणें शिपायांनीं
केलें. २५ येशूच्या वधस्तंभाजवळ त्याची आई, त्याची
मावशी, क्लोपाची बायको मरीया, आणि मरीया मग्दालीया,
ह्या उभ्या होत्या. २६ मग येशूनें आपल्या आईला व
ज्या शिष्यावर त्याची प्रीति होती त्याला जवळ उभें राहि-
लेलें पाहून आईला म्हटलें, बाई, पाहा, हा तुझा पुत्र!
२७ मग त्यानें शिष्याला म्हटलें, पाहा, ही तुझी आई!
त्या वेळेपासून त्या शिष्यानें तिला आपल्या घरीं ठेवून
घेतलें.

२८ यानंतर सर्व पूर्ण झालें आहे हें जाणून
येशूनें शास्त्रलेख पूर्ण व्हावा म्हणून, मला तहान लागली
आहे, असें म्हटलें. २९ तेथें आंब भरून ठेवलेलें एक
मांडें होतें; म्हणून त्यांनीं आंब भरलेला स्पंज एजोबाच्या
काठीवर बसवून त्याच्या तोंडाला लाविला. ३० येशूनें
आंब घेतल्यानंतर, पूर्ण झालें आहे, असें म्हटलें; आणि
मस्तक लववून आपला आत्मा समर्पण केला.

## येशूच्या कुशींत भाला भोसकणें व येशूला खडकांत खोदलेल्या कबरेंत ठेवणें

३१ तो तयारीचा दिवस होता, म्हणून शब्बाथ दिवशीं
शरीरें वधस्तंभावर राहूं नयेत [कारण तो शब्बाथाचा
दिवस मोठा होता] म्हणून त्यांचे पाय मोडावे आणि
त्यांस घेऊन जावें असी यहूद्यांनीं पिलाताजवळ विनंति
केली. ३२ मग शिपायांनीं येऊन त्याजबरोबर वधस्तंभा-
वर खिळलेल्या पहिल्याचे व दुसऱ्याचे पाय मोडिले; ३३
परंतु येशूकडे येऊन तो मरून गेला आहे असें पाहून
त्यांनीं त्याचे पाय मोडिले नाहींत; ३४ तरी शिपायांतील
एकानें त्याच्या कुशींत भाला भोसकिला, तों रक्त व पाणी
निघालें. ३५ ज्यानें हें पाहिलें त्यानें साक्ष दिली आहे व
त्याची साक्ष खरी आहे; आपण खरें बोलतों हें त्याला
ठाऊक आहे, यासाठीं कीं तुम्हींहि विश्वास धरावा. ३६
'त्याचें हाड मोडणार नाहीं' हा शास्त्रलेख पूर्ण व्हावा
म्हणून या गोष्टी घडल्या. ३७ शिवाय दुसऱ्याहि शास्त्र-
लेखांत असें म्हटलें आहे कीं 'ज्याला त्यांनीं विंधिलें
त्याजकडे ते पाहतील.'

३८ त्यानंतर अरिमथाईकर योसेफ हा येशूचा एक
शिष्य असून यहूद्यांच्या भयामुळें गुप्त शिष्य असा होता
त्यानें येशूचें शरीर घेऊन जाण्यास पिलाताजवळ विनंति
केली. पिलातानें परवानगी दिल्यावरून त्यानें जाऊन त्याचें
शरीर नेलें; ३९ आणि त्याजकडे पहिल्यानें रात्रीं आलेला
निकदेमहि गंधरस व अगरु यांचें सुमारें शंभर शेर मिश्रण
घेऊन आला. ४० त्यांनीं येशूचें शरीर घेऊन यहूद्यांच्या
उत्तरकार्याच्या रीतीप्रमाणें सुगंध द्रव्यांसहित तागाच्या
वस्त्रांनीं गुंडाळिलें. ४१ ज्या ठिकाणीं त्याला वधस्तंभावर
खिळिलें होतें त्या ठिकाणीं एक बाग असून तिच्यांत एक
नवी कबर होती, तिच्यामध्यें त्या वेळेपर्यंत कोणासहि

ठेविलें नव्हतें. ४२ यहूद्यांच्या तयारीच्या दिवसामुळें
त्यांनीं येशूला तेथें ठेविलें, कारण ती क़बर जवळ होती.

## रिकामी कबर

२० १ आठवड्याच्या पहिल्या दिवशीं पहाटेस
अंधार असतांना मरीया मग्दालीया कबरेजवळ
आली, आणि कबरेपासून धोंड काढलेली आहे
असें तिनें पाहिलें. २ यास्तव शिमोन पेत्र व ज्याच्यावर
येशूची प्रीति होती असा दुसरा शिष्य यांच्याकडे धावत
येऊन ती त्यांस म्हणाली, त्यांनीं प्रभूला कबरेंतून नेलें; व
त्याला कोठें ठेविलें हें आम्हांस ठाऊक नाहीं. ३ यावरून
पेत्र व तो दुसरा शिष्य निघून कबरेकडे जावयास निघाले.
४ तेव्हां ते दोघे बरोबर धावले; तो दुसरा शिष्य पेत्रापेक्षां
लवकर पुढें धावून कबरेजवळ प्रथम पोहंचला; ५ आणि
ओणवून त्यानें तागाचीं वस्त्रें पडलेलीं पाहिलीं, परंतु तो
आंत गेला नाहीं. ६ मग शिमोन पेत्रहि त्याच्या मागून
येऊन पोहंचला व कबरेंत शिरला; ७ आणि तागाचीं
वस्त्रें पडलेलीं व जो रुमाल त्याच्या डोक्याला होता तो
तागाच्या वस्त्रांजवळ नव्हे, तर निराळा एकीकडे गुंडाळून
पडलेला आहे असें त्यानें पाहिलें. ८ तेव्हां जो दुसरा
शिष्य पहिल्यानें कबरेजवळ आला तोहि आंत गेला, आणि
त्यानें पाहून विश्वास ठेविला. ९ त्यानें मेलेल्यांमधून पुनः
उठावें हें अवश्य आहे हा शास्त्रलेख तोंपर्यंत ते समजले
नव्हते.

## येशू मरीयेला दर्शन देतो

१० तेव्हां ते शिष्य परत आपल्या घरीं गेले.
११ इकडे मरीया बाहेर कबरेजवळ रडत उभी राहिली
होती; आणि रडतां रडतां तिनें ओणवून कबरेंत पाहिलें;
१२ तों जेथें येशूचें शरीर ठेविलें होतें तेथें शुभ्र वस्त्रें
परिधान केलेले दोन देवदूत, एक उशाजवळ व एक
पायथ्याजवळ, असे बसलेले तिनें पाहिले. १३ ते तिला
म्हणाले, बाई, कां रडतेस? ती त्यांस म्हणाली, त्यांनीं
माझ्या प्रभूला नेलें, व त्याला कोठें ठेविलें हें मला ठाऊक
नाहीं म्हणून. १४ असें बोलून ती पाठमोरी फिरली, तों
तिनें येशूला उभें राहिलेलें पाहिलें, परंतु तो येशू आहे
असें तिला समजलें नाहीं. १५ येशूनें तिला म्हटलें, बाई,
कां रडतेस? कोणाचा शोध करितेस? तो माळी
आहे असें समजून ती त्याला म्हणाली, दादा, तूं
त्याला येथून नेलें असलें तर त्याला कोठें ठेवलें
हें मला सांग, म्हणजे मी त्याला घेऊन जाईन. १६ येशूनें
तिला म्हटलें, मरीये; ती वळून त्याला इब्री भाषेंत
म्हणाली, रब्बूनी! म्हणजे गुरुजी! १७ येशूनें तिला
म्हटलें, मला शिवूं नको; कारण मी अद्यापि पित्याजवळ
वर गेलों नाहीं; तर माझ्या भावांच्याकडे जाऊन त्यांस
सांग, जो माझा पिता व तुमचा पिता आणि माझा देव
व तुमचा देव त्याच्याकडे मी वर जातों. १८ मरीया
मग्दालीयेनें जाऊन, मीं प्रभूला पाहिलें, व त्यानें मला या
गोष्टी सांगितल्या, हें वर्तमान शिष्यांस कळविलें.

## येशू प्रेषितांना दर्शन देतो

१९ त्याच दिवशीं म्हणजे आठवड्याच्या पहिल्या
दिवशीं संध्याकाळ झाल्यावर, जेथें शिष्य होते तेथील
दारें यहूद्यांच्या भीतीमुळें बंद असतां, येशू आला व
मध्यें उभा राहून त्यांस म्हणाला, तुम्हांस शांति असो. २०
असें बोलून त्यानें आपले हात व कूस त्यांस दाखविली;
तेव्हां प्रभूला पाहून शिष्यांना आनंद वाटला. २१ येशू
पुनः त्यांस म्हणाला, तुम्हांस शांति असो; जसें
पित्यानें मला पाठविलें आहे तसें मीहि तुम्हांस
पाठवितों. २२ असें बोलून त्यानें त्यांजवर फुंकर
टाकिला, आणि त्यांस म्हटलें, पवित्र आत्मा घ्या; २३
ज्या कोणाच्या पापांची तुम्ही क्षमा करितां त्यांची क्षमा
झाली आहे; आणि ज्या कोणाचीं तुम्ही राखितां
तीं राखिलेलीं आहेत.

## येशू थोमाला दर्शन देतो

२४ येशू आला तेव्हां बारांतील एक, म्हणजे
दिदुम म्हटलेला थोमा, हा त्यांच्याबरोबर नव्हता.
२५ यास्तव दुसऱ्या शिष्यांनीं त्याला सांगितलें, आम्हीं
प्रभूला पाहिलें; तरी त्यानें त्यांस म्हटलें, त्याच्या हातांत
खिळ्यांचा वण पाहिल्यावांचून, खिळ्यांच्या वणांत आपलें
बोट घातल्यावांचून व त्याच्या कुशींत आपला हात
घातल्यावांचून मी विश्वास धरणारच नाहीं.

२६ मग आठ दिवसांनंतर त्याचे शिष्य पुनः आंत
असून त्यांच्याबरोबर थोमा होता. तेव्हां दारें बंद असतां
येशू आला व मध्यें उभा राहून म्हणाला, तुम्हांस शांति
असो. २७ नंतर त्यानें थोमाला म्हटलें, तूं आपलें
बोट इकडे करून माझे हात पाहा; आणि आपला हात
इकडे पुढें करून माझ्या कुशींत घाल; आणि विश्वासहीन
असूं नको, तर विश्वास धरणारा ऐस. २८ थोमानें त्याला
म्हटलें, माझा प्रभु व माझा देव. २९ येशूनें त्याला
म्हटलें, तूं मला पाहिलें आहे म्हणून विश्वास धरिला आहे;
पाहिल्यावांचून विश्वास धरणारे ते धन्य.

### या शुभवर्तमानाचा हेतु

३० या पुस्तकांत लिहिलीं नाहींत अशीं पुष्कळ
दुसरींहि चिन्हें येशूनें आपल्या शिष्यांदेखतां केलीं;
३१ येशू हा देवाचा पुत्र ख्रिस्त आहे असा तुम्हीं विश्वास
धरावा, आणि विश्वास धरून तुम्हांला त्याच्या नामानें
जीवन प्राप्त व्हावें, म्हणून हीं वर्णिलीं आहेत.

### येशू तिबिर्या समुद्राजवळ शिष्यांस दर्शन देतो

**२१** १ त्यानंतर तिबिर्याच्या समुद्राजवळ येशू
शिष्यांस पुनः प्रगट झाला; आणि तो या प्रकारें
प्रगट झाला. २ शिमोन पेत्र, दिदुम म्हटलेला
थोमा, गालीलांतील काना एथचा नथनेल, जब्दीचे पुत्र व
त्याच्या शिष्यांतील दुसरे दोघे हे एकत्र असतां, ३ शिमोन
पेत्रानें त्यांस म्हटलें, मी मासे धरावयाला जातों. ते
त्याला म्हणाले, आम्हीहि तुझ्याबरोबर येतों. तेव्हां ते
निघून मचव्यांत बसले; आणि त्या रात्रीं त्यांनीं कांहीं
धरिलें नाहीं. ४ मग पहाट होत असतां येशू समुद्राच्या
तीरीं उभा राहिला; तथापि तो येशू आहे असें शिष्यांस
समजलें नव्हतें. ५ तेव्हां येशूनें त्यांस म्हटलें, मुलांनो,
तुम्हांजवळ कांहीं खावयाला आहे काय? त्यांनीं, नाहीं,
असें त्याला उत्तर दिलें. ६ त्यानें त्यांस म्हटलें, मचव्याच्या
उजव्या बाजूस जाळें टाका म्हणजे तुम्हांस सांपडेल;
म्हणून त्यांनीं तें टाकिलें, तेव्हां माशांच्या घोळक्यामुळें तें
त्यांस ओढवेना. ७ यावरून ज्या शिष्यावर येशूची प्रीति
होती तो पेत्राला म्हणाला, प्रभु आहे, प्रभु आहे. हें ऐकून
शिमोन पेत्रानें अंगरखा घालून तो कमरेला गुंडाळिला
(कारण तो उघडा होता) आणि समुद्रांत उडी टाकिली.
८ दुसरे शिष्य माशांचें जाळें ओढीत ओढीत होडींतून
आले, (कारण ते काठापासून दूर नव्हते, तर सुमारें दोनशें
हातांवर होते). ९ मग काठीं उतरले तों त्यांनीं कोळ-
शांचा विस्तव आणि त्यावर घातलेली मासळी व भाकर
पाहिली. १० येशूनें त्यांस म्हटलें, तुम्ही आतां धरलेल्या
माशांतून कांहीं आणा. ११ यास्तव शिमोन पेत्रानें
मचव्यावर चढून एकशें त्रेपन्न मोठ्या माशांनीं भरलेलें
जाळें काठीं ओढून आणिलें; तितके असतांहि जाळें फाटलें
नाहीं. १२ येशू त्यांस म्हणाला, या, जेवा. तेव्हां तो प्रभु
आहे असें त्यांस समजलें, म्हणून तूं कोण आहेस हें
त्याला विचारावयास शिष्यांतील कोणी धजला नाहीं.
१३ येशूनें येऊन भाकर घेतली व त्यांस दिली; तशीच
मासळीहि दिली. १४ येशू मेलेल्यांतून उठल्यावर आपल्या
शिष्यांस प्रगट झाल्याची ही तिसरी वेळ.

### पेत्राबरोबर येशूचें शेवटलें भाषण

१५ ते जेवल्यानंतर येशूनें शिमोन पेत्राला म्हटलें,
योहानाच्या पुत्रा शिमोना, यांपेक्षां तूं मजवर अधिक
प्रीति करितोस काय? तो त्याला म्हणाला, होय प्रभु,
आपणावर मी प्रेम करितों, हें आपल्याला ठाऊक आहे. त्यानें
त्याला म्हटलें, माझ्या कोकरांस चार. १६ पुनः दुसऱ्यानें
तो त्याला म्हणाला, योहानाच्या पुत्रा शिमोना, मजवर
प्रीति करितोस काय? तो त्याला म्हणाला, होय प्रभु, मी
आपणावर प्रेम करितों, हें आपल्याला ठाऊक आहे. त्यानें
त्याला म्हटलें, माझ्या मेंढरांस पाळ. १७ तिसऱ्यानें तो
त्याला म्हणाला, योहानाच्या पुत्रा शिमोना, मजवर प्रेम
करितोस काय? मजवर प्रेम करितोस काय, असें
तिसऱ्यानें त्याला म्हटलें, म्हणून पेत्र दुःखी होऊन त्याला
म्हणाला, प्रभो, आपणाला सर्व ठाऊक आहे; मी आपणावर
प्रेम करितों हें आपण ओळखिलें आहे. येशूनें त्याला
म्हटलें, माझ्या मेंढरांस चार. १८ मी तुला खचीत खचीत
सांगतों, तूं तरुण होतास तेव्हां स्वतः कमर बांधून तुझ्या
इच्छेस येईल तिकडे जात असस; परंतु तूं म्हातारा होशील
तेव्हां हात लांब करिशील आणि दुसरा इसम तुझी कमर
बांधून तुझ्या इच्छेस येणार नाहीं तेथें तुला नेईल. १९

तो कोणत्या प्रकारच्या मरणानें देवाचें गौरव करील हें
सुचविण्याकरितां तो हें बोलला; आणि असें बोलल्यावर
त्यानें त्याला म्हटलें, माझ्यामागें ये. २० मग पेत्र वळला
आणि ज्या शिष्यावर येशूची प्रीति होती आणि जो
भोजनाच्या वेळेस त्याच्या उराशीं टेकला असतां मागें
लवून, प्रभो, तुला धरून देणारा तो कोण आहे, असें म्हणाला
होता, त्याला त्यानें मागें चालतांना पाहिलें. २१ त्याला
पाहून पेत्र येशूला म्हणाला, प्रभुजी, याचें काय? २२
येशूनें त्याला म्हटलें, मी येईं तोंपर्यंत त्यानें राहावें अशी
माझी इच्छा असली तर त्याचें तुला काय? तूं माझ्यामागें
ये. २३ यावरून तो शिष्य मरणार नाहीं अशी वदंता
बंधुवर्गामध्यें पसरली; तरी तो मरणार नाहीं असें येशूनें
त्याला म्हटलें नव्हतें, तर मी येईं तोंपर्यंत त्यानें राहावें
अशी माझी इच्छा असली तर त्याचें तुला काय, असें
म्हटलें.

### समाप्ति

२४ जो शिष्य या गोष्टींविषयीं साक्ष देतो व ज्यानें
या गोष्टी लिहिल्या तोच हा आहे; आणि त्याची साक्ष
खरी आहे हें आम्हांला माहीत आहे.
२५ येशूनें केलेलीं दुसरींहि बहुत कृत्यें आहेत, तीं
सर्व एकेक लिहिलीं तर लिहिलेलीं पुस्तकें या जगांत
मावणार नाहींत, असें मला वाटतें.

---

# प्रेषितांचीं कृत्यें



### विषयप्रवेश

१ हे थियफिला, येशूनें जे प्रेषित निवडिले होते
1 त्यांस पवित्र आत्म्याच्या द्वारें आज्ञा सांगितल्यानंतर
तो वर घेतला गेला, २ त्या दिवसापर्यंत त्यानें जें
जें करावयास व शिकवावयास आरंभिलें होतें त्या सर्वां-
विषयीं मीं पहिला ग्रंथ केला. ३ मरण सोसल्यानंतरहि
त्यानें त्यांस पुष्कळ प्रमाणांनीं आपण जीवंत आहों असें
दाखविलें, आणि चाळीस दिवसपर्यंत तो त्यांस दर्शन देत
असे व देवाच्या राज्याच्या गोष्टी सांगत असे. ४ तो व
ते एकत्र जमले असतांना त्यानें त्यांस आज्ञा केली कीं
यरुशलेम सोडून जाऊं नका, तर जें पित्याचें वचन
तुम्हीं मजपासून ऐकलें आहे त्याची वाट पाहा; ५ कारण
योहानानें पाण्यानें बाप्तिस्मा केला; तुमचा बाप्तिस्मा
थोड्या दिवसांनीं पवित्र आत्म्यानें होईल.

### येशूचें स्वर्गारोहण

६ यास्तव ते एकत्र असतांना त्यांनीं त्याला विचारिलें,
प्रभो, या वेळेस आपण इस्राएलाचें राज्य पुनः स्थापीत
करणार काय? ७ तो त्यांस म्हणाला, जे काल व प्रसंग
पित्यानें आपल्या स्वाधीन ठेविले आहेत ते ओळखणें
तुम्हांकडे नाहीं. ८ पवित्र आत्मा तुम्हांवर येईल तेव्हां
तुम्हांस सामर्थ्य प्राप्त होईल, आणि यरुशलेमांत, सर्व
यहूदीयांत, शोमरोनांत व पृथ्वीच्या शेवटापर्यंत तुम्ही
माझे साक्षी व्हाल. ९ असें सांगितल्यावर त्यांच्या डोळ्यां-
देखत तो वर घेतला गेला; आणि मेघानें त्याला त्यांच्या
दृष्टीआड केलें. १० तो जात असतां ते आकाशाकडे
निरखून पाहत होते, तेव्हां पाहा, शुभ्र वस्त्रें परिधान
केलेले दोन पुरुष त्यांच्याजवळ उभे होते; ११ ते म्हणाले,
अहो गालीलकरांनो, तुम्ही आकाशाकडे कां पाहत उभे
राहिलां? तुम्हांपासून वर आकाशांत घेतला गेला आहे
तोच येशू, जसें तुम्हीं त्याला आकाशांत जातां पाहिलें,
तसाच येईल.

### बाराव्या प्रेषिताची नेमणूक

१२ मग यरुशलेमाजवळ म्हणजे शब्बाथ दिवसाच्या
मजलेवर असलेल्या जैतून नामें डोंगरावरून ते यरुशलेमांत
परत आले; १३ आणि आल्यावर ते माडीवर एका
खोलींत गेले, तेथें पेत्र, योहान, याकोब, अंद्रिया, फिलिप्प,

थोमा, बर्थलमय, मत्तय, अल्फीचा पुत्र याकोब, शिमोन
जिलोत व याकोबाचा पुत्र यहूदा हे राहत होते; १४ हे
सर्व जण, कितीएक स्त्रिया, येशूची आई मरीया व त्याचे
भाऊ यांच्यासह एकचित्तानें प्रार्थना करण्यांत तत्पर असत.
१५ त्या दिवसांत पेत्र बंधुवर्गामध्यें ( सुमारें
एकशेंवीस लोकांच्या मोठ्या जमावामध्यें ), उभा राहून
म्हणाला, १६ बंधुजनहो, येशूला धरून नेणाऱ्यांचा
मार्गदर्शक असा झालेल्या यहूदाविषयीं पवित्र आत्मा
दाविदाच्या मुखानें जें वचन बोलला तें पूर्ण होण्याचें
अगत्य होतें. १७ तो आपल्यांमध्यें गणलेला होता, आणि
या सेवेचा वांटा त्याला मिळाला होता. १८ ( त्यानें
आपल्या अधर्माच्या मजुरीनें शेत विकत घेतलें; तो
पालथा पडल्यानें मध्येंच फुटला, व त्याचीं सर्व आंतडीं
बाहेर निघालीं. १९ हें यरुशलेमांतल्या सर्व राहणाऱ्यांस
कळलें; म्हणून त्यांच्या भाषेंत त्या शेताला हकलदमा
म्हणजे रक्ताचें शेत असें नांव पडलें आहे. ) २०
स्तोत्रसंहितेंत असें लिहिलें आहे :

त्याचें ठिकाण ओसाड होवो,
व त्यांत कोणीहि न राहो;
आणि,
त्याचा हुद्दा दुसरा घेवो.

२१ यास्तव योहानाच्या बाप्तिस्म्यापासून तर ज्या
दिवशीं प्रभु येशूला आपल्यापासून वर घेण्यांत आलें
तोंपर्यंत, २२ म्हणजे तो आपणांमध्यें येतजात असे त्या
सगळ्या काळांत, जीं हीं मनुष्यें आपल्या संगतीसोबतीत
होतीं त्यांच्यांतून कोणीएकानें आपल्याबरोबर त्याच्या
पुनरुत्थानाचा साक्षी झालें पाहिजे. २३ तेव्हां ज्याचें
उपनांव यूस्त तो बर्सबा म्हटलेला योसेफ व मत्थिया, या
दोघांस त्यांनीं पुढें आणिलें. २४ मग त्यांनीं अशी प्रार्थना
केली : हे सर्वांतःकरणसाक्षी प्रभू, २५ हें सेवकपण व
प्रेषितपण सोडून आपल्या जागीं गेलेल्या यहूदाचें पद
ज्याला मिळावें असा या दोघांतून तूं कोणता निव-
डिला आहे तो दाखीव. २६ मग त्यांनीं त्यांच्या-
साठीं चिठ्या टाकिल्यावर मत्थियाची चिठी निघाली;
तेव्हां त्याला अकरा प्रेषितांत गणण्यांत आलें.

## पवित्र आत्म्याचें दान

२ १ नंतर पेंटेकॉस्ट म्हणजे पन्नासावा दिवस
आला तेव्हां ते सर्व एकत्र जमले असतां, २
अकस्मात् मोठ्या वाऱ्याच्या सुसाट्यासारिखा आका-
शांतून नाद आला, आणि ज्या घरांत ते बसले होते
तें सर्व त्यानें भरलें. ३ अग्नीच्या जिभांसारख्या
वेगवेगळ्या झालेल्या जिभा त्यांस दिसल्या; आणि त्या
प्रत्येकावर एकएक अशा बसल्या. ४ तेव्हां ते सर्व
पवित्र आत्म्यानें परिपूर्ण झाले, आणि आत्म्यानें जसें
त्यांस वदविलें तसें ते अन्य भाषांतून बोलूं लागले.
५ त्या वेळेस आकाशाखालच्या प्रत्येक राष्ट्रांतील
भक्तिमान् यहूदी यरुशलेमांत राहत होते. ६ तो नाद
झाल्यावर लोकसमुदाय एकत्र होऊन गोंधळून गेला;
कारण कीं प्रत्येकानें आपापल्या भाषेंत त्यांस बोलतांना
ऐकलें. ७ ते सर्व चकित व विस्मित होऊन म्हणाले,
पाहा, हे बोलणारे सर्व गालीली ना ? ८ तर आपण
प्रत्येक जण आपापली जन्मभाषा ऐकतों हें कसें ?
९ पार्थी, मेदी, एलामी, मेसोपटेम्या, यहूदीया,
कप्पदुकिया, पंत, आसिया, १० फ्रुगिया, पंफूलिया,
मिसर व कुरेणेच्या जवळचा लिबुवा देश यांतले
राहणारे, यहूदी व यहूदीयमतानुसारी असे रोमीय
प्रवासी, ११ क्रेतीय, अरब, असे आपण त्यांस
आपापल्या भाषांत देवाचीं महत्कर्में सांगतांना ऐकतों.
१२ तेव्हां ते सर्व विस्मित होऊन व गोंधळून जाऊन
एकमेकांस म्हणाले, हें काय असेल ? १३ इतर कित्येक
लोक थट्टा करून म्हणाले, हे नव्या द्राक्षारसानें मस्त
झाले आहेत.

## पेंटेकॉस्टच्या वेळचें पेत्राचें भाषण

१४ तेव्हां पेत्र अकरा शिष्यांसुद्धां उभा राहून
त्यांस मोठ्यानें म्हणाला, अहो यहूदी लोकांनो व
यरुशलेमांतील सर्व राहणाऱ्यांनो, हें लक्षांत आणा व माझें
बोलणें ऐकून घ्या; १५ तुम्हांस वाटतें तसे हे मस्त झाले
नाहींत; कारण हा दिवसाचा पहिला प्रहर आहे; १६ परंतु
हा प्रकार योएल संदेष्ट्याच्या द्वारें सांगितलेल्या संदेशा-
प्रमाणें घडला आहे; तो संदेश असा :—

१७ देव म्हणतो, शेवटल्या दिवसांत असें होईल कीं
मी आपल्या आत्म्याचा मनुष्यमात्रावर
वर्षाव करीन;
तेव्हां तुमचे पुत्र व तुमच्या कन्या
संदेश देतील,
तुमच्या तरुणांस दृष्टांत होतील
व तुमच्या वृद्धांस स्वप्नें पडतील;
१८ आणखी त्या दिवसांत मी आपल्या दासांवर व
आपल्या दासींवर
आपल्या आत्म्याचा वर्षाव करीन; म्हणजे तीं
संदेश देतील;
१९ वर आकाशांत उत्पात,
व खालीं पृथ्वीवर चिन्हें,
म्हणजे रक्त, अग्नि व धूम्ररूप वाफ अशीं
दाखवीन;
२० परमेश्वराचा महान् व प्रसिद्ध दिवस येण्यापूर्वी
सूर्य अंधकारमय
व चंद्र रक्तमय होईल;
२१ तेव्हां असें होईल कीं जो कोणी परमेश्वराचें
नाम घेऊन त्याचा धावा करील तो तरेल.
२२ अहो इस्राएल लोकांनो, या गोष्टी ऐका; नासोरी
येशू याच्याद्वारें देवानें जीं महत्कृत्यें, अद्भुतें व चिन्हें
तुम्हांला दाखविलीं त्यांची तुम्हांला माहिती आहे,
त्यांवरून देवानें तुम्हांकरितां पटविलेला असा तो मनुष्य
होता; २३ तो देवाच्या संकल्पाप्रमाणें व पूर्वज्ञाना-
प्रमाणें तुमच्या स्वाधीन झाल्यावर तुम्हीं त्याला धरून
अधर्म्यांच्या हातांनीं वधस्तंभावर खिळून मारिलें, २४
त्याला देवानें मरणाच्या वेदनांपासून सोडवून उठविलें,
कारण त्यानें मरणाच्या स्वाधीन राहावें हें अशक्य
होतें.
२५ दावीद त्याजविषयीं असें म्हणतो :
मीं प्रभूला आपणापुढें नित्य पाहिलें आहे;
मीं ढळूं नये म्हणून तो
माझ्या उजवीकडे आहे;
२६ यास्तव माझें हृदय आनंदित, व माझी जीभ
उल्लसित झाली;
आणखी माझा देहहि आशेमध्यें निवास करील;
२७ कारण तूं माझा जीव अधोलोकांत
राहूं देणार नाहींस,
व आपल्या पवित्र पुरुषाला कुजण्याचा अनुभव
येऊं देणार नाहींस.
२८ जीवनाचे मार्ग तूं मला कळविले आहेत;
तूं आपल्या दर्शनानें मला
हर्षभरित करिशील.

२९ अहो बंधुजनहो, कुलाधिपति दावीद याज-
विषयीं मी तुम्हांबरोबर प्रशस्तपणें बोलतों. तो मेला,
त्याला पुरलें व त्याची कबर आतांपर्यंत आपल्यामध्यें
आहे. ३० तो संदेष्टा होता आणि त्याला ठाऊक होतें कीं
देव शपथ वाहून म्हणाला, तुझ्या संततींतील एकाला
तुझ्या राजासनावर बसवीन, ३१ ह्याचें पूर्वज्ञान
असल्यामुळें तो ख्रिस्ताच्या उठण्याविषयीं बोलला कीं
त्याचा आत्मा अधोलोकांत राहूं दिला नाहीं, आणि
त्याच्या देहाला कुजण्याचा अनुभव आला नाहीं. ३२
त्या येशूला देवानें उठविलें याविषयीं आम्ही सर्व
साक्षी आहों. ३३ यास्तव तो देवाच्या उजव्या
हस्तें उच्च पदीं बसविलेला आहे व त्याला पवित्र
आत्म्याविषयींचें वचन प्राप्त झालें आहे आणि त्यानें,
तुम्ही जें पाहतां व ऐकतां तें, ओतिलें आहे. ३४
दावीद स्वर्गास चढून गेला नाहीं; पण तो स्वतः
म्हणतो :

परमेश्वरानें माझ्या प्रभूला सांगितलें कीं
३५ मी तुझे वैरी तुझ्या पायांचें आसन करीपर्यंत
तूं माझ्या उजवीकडे बैस.

३६ यास्तव इस्राएलाच्या सर्व घराण्यानें हें निश्चय-
पूर्वक समजून घ्यावें कीं ज्या येशूला तुम्हीं वध-
स्तंभावर खिळून मारिलें त्याला देवानें प्रभु व ख्रिस्त
असें करून ठेविलें आहे.

३७ हें ऐकून त्यांच्या अंतःकरणांस चुरचूर लागली,
आणि ते पेत्र व इतर प्रेषित यांस म्हणाले, बंधु-
जनहो, आम्हीं काय करावें ? ३८ पेत्र त्यांस म्हणाला,

पश्चात्ताप करा, आणि पापांची क्षमा व्हावी म्हणून
तुम्ही प्रत्येक जण येशू ख्रिस्ताच्या नामांत बाप्तिस्मा
घ्या; म्हणजे पवित्र आत्म्याचें दान तुम्हांला प्राप्त होईल.
३९ कारण तें वचन तुम्हांस, तुमच्या मुलांबाळांस व
सर्व जे दूर आहेत त्यांस, म्हणजे जितक्यांस प्रभु
जो आपला देव स्वतःकडे बोलावील, तितक्यांस आहे.
४० आणखी त्यानें दुसऱ्या पुष्कळ गोष्टींनीं त्यांस
साक्ष दिली व बोध करून म्हटलें, या कुटिल पिढी-
पासून तुम्ही आपला बचाव करून घ्या. ४१ तेव्हां
ज्यांनीं त्याचें वचन ग्रहण केलें त्यांचा बाप्तिस्मा
झाला; आणि त्या दिवशीं सुमारें तीन हजार मनुष्यांची
त्यांच्यांत भर पडली.

## ख्रिस्ती मंडळीचें धार्मिक जीवन

४२ तीं प्रेषितांच्या शिक्षणांत, संगतींत, भाकर
मोडण्यांत व प्रार्थना करण्यांत तत्पर असत.

४३ तेव्हां प्रत्येक मनुष्याला भय प्राप्त झालें;
आणि प्रेषितांच्या हातून पुष्कळ अद्भुतें व चिन्हें घडत
होतीं. ४४ तेव्हां सर्व विश्वास ठेवणारे एकत्र होते,
आणि त्यांचें सर्व समाईक होतें. ४५ ते आपापली
जमीन व मालमत्ता विकून जसजशी प्रत्येकाला गरज
लागत असे तसतसें सर्वांस वांटून देत असत. ४६
ते प्रतिदिवशीं एकचित्तानें मंदिरांत जात असत; घरीं
भाकर मोडीत असत; आणि देवाची स्तुति करीत
हर्षानें व सालस मनानें अन्न खात असत; ४७ सर्व
लोक त्यांस प्रसन्न असत; आणि तारणप्राप्ति झालेल्या
इसमांची प्रभु प्रतिदिवशीं त्यांच्यांत भर घालीत असे.

## लंगड्या भिकाऱ्याला बरें करणें

१ एकदा पेत्र व योहान हे प्रार्थनेच्या वेळेस
३ तिसऱ्या प्रहरीं मंदिरांत जात होते. २ तेव्हां जन्मतः
पांगळा असा कोणीएक माणूस होता; त्याला उचलून
नेऊन मंदिरांत जाणाऱ्यांजवळ भीक मागण्यासाठीं प्रति-
दिवशीं मंदिराच्या सुंदर नामें दरवाजाजवळ ठेवीत असत.
३ पेत्र व योहान हे मंदिरांत जाणार आहेत असें पाहून
त्यानें भीक मागितली. ४ तेव्हां पेत्र व योहान त्याला
निरखून पाहून म्हणाले, आम्हांकडे पाहा. ५ तेव्हां त्यांज-
पासून कांहीं मिळेल अशी आशा धरून त्यानें त्यांजकडे
लक्ष लाविलें. ६ पेत्र म्हणाला, माझ्याजवळ सोनेंरुपें कांही
नाहीं; जें आहे तें तुला देतों; नासोरी येशू ख्रिस्ताच्या
नामानें चालू लाग; ७ आणि त्यानें त्याचा उजवा हात
धरून त्याला उठविलें, तेव्हां त्याचीं पावलें व घोटे यांत
तत्काळ बळ आलें; ८ तो उडी मारून उभा राहिला व
चालूं लागला; आणि तो चालत, उड्या मारीत व देवाची
स्तुति करीत त्यांच्याबरोबर मंदिरांत गेला. ९ त्याला सर्व
लोकांनीं चालतांना व देवाची स्तुति करितांना पाहिलें; १०
आणि जो मंदिराच्या सुंदर दरवाजाजवळ भीक मागण्या-
साठीं बसत असे तो हाच आहे असें त्यांनीं त्याला ओळ-
खिलें. तेव्हां त्याला जें घडलें होतें त्यावरून ते आश्चर्यानें
व विस्मयानें व्याप्त झाले. ११ मग तो पेत्र व योहान यांस
बिलगून राहिला असतां, सर्व लोक फार विस्मित
होऊन त्यांजकडे शलमोनाची देवडी म्हटलेल्या ठिकाणीं
धावत आले.

## मंदिरामधलें पेत्राचें भाषण

१२ हें पाहून पेत्रानें लोकांस म्हटलें, अहो, इस्राएल
लोकांनो, याचें आश्चर्य कां करितां? अथवा आम्हीं आपल्या
सामर्थ्यानें अगर सुभक्तीनें याला चालावयास लाविलें असें
समजून आम्हांकडे कां न्याहाळून पाहतां? १३ अब्राहाम,
इसहाक व याकोब यांचा देव, आपल्या पूर्वजांचा देव,
यानें आपला सेवक येशू याचें गौरव केलें; त्याला तुम्हीं
धरिलें व पिलातानें त्याला सोडावयाचा निश्चय केला
असतांहि त्याच्यासमक्ष त्याला नाकारिलें. १४ जो पवित्र व
धार्मिक पुरुष त्याला तुम्हीं नाकारिलें आणि घातकी पुरुष
आम्हांस द्या असें मागितलें. १५ तुम्हीं जीवनाच्या अधि-
काऱ्याला जिवें मारिलें; त्याला देवानें मेलेल्यांमधून उठविलें
याचे आम्ही साक्षी आहों. १६ ज्याला तुम्ही पाहतां व
ओळखितां त्या या मनुष्याला त्याच्या नामावरील विश्वा-
सावरून, त्याच्या नामानें, शक्तिमान् केलें; त्याजवरील
विश्वासानें याला तुम्हां सर्वांसमक्ष ही शरीरसंपत्ति प्राप्त
झाली. १७ बंधुजनहो, मी हें जाणून आहें कीं तुम्ही हें
अज्ञानामुळें केलें, तसेंच तुमच्या अधिकाऱ्यांनींहि केलें;
१८ परंतु आपल्या ख्रिस्तानें दुःख सहन करावें म्हणून

देवानें सर्व संदेष्ट्यांच्या मुखानें पूर्वी सांगितलें होतें तें
त्यानें त्याप्रमाणें पूर्ण केलें. १९ यास्तव तुमचीं पापें पुसून
टाकिलीं जावीं म्हणून पश्चात्ताप करा व मागें वळा, अशा-
साठीं कीं विश्रांति मिळण्याचे समय प्रभूजवळून यावे; २०
आणि तुम्हांकरितां पूर्वी नेमिलेला येशू ख्रिस्त याला त्यानें
पाठवावें; २१ ज्याविषयीं आरंभापासून देवानें आपल्या
पवित्र संदेष्ट्यांच्या मुखानें सांगितलें, त्या सर्वांचें यथास्थित
होण्याच्या काळापर्यंत त्याला स्वर्गांत राहणें प्राप्त आहे.
२२ मोशानेंहि म्हटलें, ‘प्रभु देव माझ्यासारिखा संदेष्टा
तुम्हांसाठीं तुमच्या भावांमधून उठवील; तो जें कांहीं
तुम्हांला सांगेल तें सर्व त्याचें ऐका; २३ आणि असें होईल
कीं जो कोणी त्या संदेष्ट्याचें ऐकणार नाहीं तो लोकांतून
अगदीं नष्ट केला जाईल.’ २४ आणखी शमुवेलापासून,
आणि परंपरेनें जे संदेष्टे झाले त्यांजपासून, जितके
बोलत आले त्या सर्वांनीं ह्या दिवसाविषयीं सांगितलें. २५
तुम्ही संदेष्ट्यांचे पुत्र आहां, आणि ‘तुझ्या संततीच्या
द्वारें पृथ्वींतील सर्व कुळें आशीर्वादित होतील,’ असें
अब्राहामाला बोलून देवानें तुमच्या पूर्वजांबरोबर केलेल्या
कराराचेहि पुत्र तुम्ही आहां. २६ देवानें आपल्या सेवकाला
उठवून प्रथम तुम्हांकडे पाठविलें, यासाठीं कीं त्यानें तुम्हां
प्रत्येकाला तुमच्या दुष्कर्मांपासून वळून जाण्याचा
आशीर्वाद देत जावा.

## धर्मसभेपुढें पेत्र व योहान

४ १ ते लोकांबरोबर बोलत असतां त्यांजवर
याजक, मंदिराचा सरदार व सदोकी हे चालून
आले; २ कारण ते लोकांस शिक्षण देऊन, येशूच्या
द्वारें मेलेल्यांतून पुनः उठणें होईल असें प्रसिद्धपणें
सांगतात, ह्याचें त्यांस अतिशय वाईट वाटलें. ३ तेव्हां
त्यांनीं त्यांजवर हात टाकिले, व संध्याकाळ झाली म्हणून
सकाळपर्यंत त्यांस चौकींत ठेविलें. ४ तथापि वचन
ऐकणाऱ्यांतील पुष्कळ लोकांनीं विश्वास धरिला, आणि
पुरुषांची संख्या सुमारें पांच हजार झाली.

५ नंतर दुसऱ्या दिवशीं असें झालें कीं त्यांचे अधि-
कारी, वडील व शास्त्री, ६ हे आणि मुख्य याजक
हन्ना, कयफा, योहान, आलेक्सांद्र, व मुख्य याज-
काच्या कुळांतील जितके होते तितके यरुशलेमांत
एकत्र झाले; ७ आणि त्यांनीं त्यांस मध्यें उभें करून
विचारिलें, हें तुम्हीं कोणत्या सामर्थ्यानें किंवा कोणत्या
नामानें केलें ? ८ तेव्हां पेत्र पवित्र आत्म्यानें
पूर्ण होऊन त्यांस म्हणाला, अहो लोकाधिकाऱ्यांनो व
वडील जनांनो, ९ एका दुर्बल मनुष्यावर कसा उप-
कार झाला, म्हणजे तो कशानें बरा झाला, याविषयीं
आमची चौकशी आज व्हावयाची असेल, १० तर
तुम्हां सर्वांस व सर्व इस्राएल लोकांस हें कळवें कीं
ज्याला तुम्हीं वधस्तंभावर खिळून मारिलें, ज्याला
देवानें मेलेल्यांमधून उठविलें, त्या नासोरी येशू
ख्रिस्ताच्या नामानें हा मनुष्य बरा होऊन तुमच्या पुढें
उभा राहिला आहे. ११ ‘जो धोंडा तुम्हीं बांध-
णाऱ्यांनीं तुच्छ मानिला असतां कोनशिला झाला’
तो हाच आहे; १२ आणि तारण दुसऱ्या कोणा-
कडून नाहीं; जेणेंकरून आपलें तारण व्हावयाचें असें
दुसरें नाम आकाशाखालीं मनुष्यांमध्यें दिलेलें नाहीं.

१३ तेव्हां पेत्राचें व योहानाचें धैर्य पाहून,
तसेंच हे अनक्षर व अज्ञानी इसम आहेत असें
समजून त्यांनीं आश्चर्य केलें; आणि हे येशूच्या सह-
वासांत होते असेंहि त्यांनीं ओळखिलें; १४ तरी त्या
बरें झालेल्या मनुष्यास त्यांच्याजवळ उभे असलेलें
पाहून त्यांच्यानें कांहीं विरुद्ध बोलवेना. १५ मग
त्यांनीं त्यांस सभेच्या बाहेर जाण्यास आज्ञा केली,
आणि ते आपसांत विचार करून म्हणाले, १६ या
माणसांस आपण काय करावें ? कारण त्यांजकडून
प्रसिद्ध चमत्कार घडला खरा, हें सर्व यरुशलेमकरांस
ठाऊक आहे; तें आपणांला नाहीं म्हणतां येत नाहीं;
१७ तरी हें लोकांमध्यें अधिक पसरूं नये म्हणून
त्यांस अशी धमकी द्यावी कीं यापुढें त्यांनीं या
नामानें कोणाबरोबर बोलूं नये. १८ मग त्यांनीं त्यांस
बोलावून अशी निक्षून ताकीद दिली कीं येशूच्या
नामानें अगदीं बोलूं अगर शिकवूंहि नका; १९ परंतु
पेत्र व योहान यांनीं त्यांस उत्तर दिलें कीं देवापेक्षां
तुमचें ऐकावें हें देवाच्या दृष्टीनें योग्य कीं अयोग्य

याचा तुम्हीच विचार करा. २० जें आम्हीं पाहिलें व
ऐकलें तें बोलूं नये हें आमच्यानें होत नाहीं. २१ तेव्हां
त्यांनीं त्यांस आणखी धमकावून सोडून दिलें; त्यांस
शिक्षा कशी करावी हें लोकांमुळें त्यांस सुचेना;
कारण घडलेल्या गोष्टीमुळें सर्व लोक देवाचें गौरव
करीत होते; २२ आणि बरें करण्याचा हा चमत्कार
ज्याच्यावर घडला होता तो मनुष्य वयानें चाळीस
वर्षांवर होता.

## पेत्र व योहान आपल्या मित्रांकडे परत येतात

२३ ते सुटल्यानंतर आपल्या मंडळाकडे गेले,
आणि त्यांस मुख्य याजकांनीं व वडिलांनीं जें कांहीं
म्हटलें होतें तें सर्व त्यांनीं सांगितलें. २४ हें ऐकून
ते एकचित्त होऊन देवाला उच्च वाणीनें म्हणाले, हे
प्रभो, आकाश, पृथ्वी, समुद्र व त्यांतील सर्व कांहीं
यांचा उत्पन्नकर्ता तूंच आहेस; २५ आमचा पूर्वज,
तुझा सेवक दावीद, याच्या मुखानें पवित्र आत्म्याच्या
द्वारें तूं म्हटलें;

राष्ट्रें कां खवळलीं,
व लोकांनीं व्यर्थ कल्पना कां केल्या?
२६ प्रभूविरुद्ध व त्याच्या अभिषिक्ताविरुद्ध
पृथ्वीचे राजे उभे राहिले,
व अधिकारी जमले;

२७ कारण खरोखरच तुझा अभिषिक्त म्हणजे
तुझा पवित्र सेवक येशू याच्याविरुद्ध ह्या शहरांत
विदेशी लोक व इस्राएल लोक यांच्यासुद्धां हेरोद व
पंतय पिलात हे एकत्र झाले; २८ यासाठीं कीं जें
कांहीं घडावें म्हणून तूं स्वहस्तें व स्वसंकल्पानें पूर्वी
नेमिलें होतें तें त्यांनीं करावें. २९ तर हे प्रभो,
आतां तूं त्यांच्या धमकावण्याकडे पाहा; ३० आणि बरें
करण्याकरितां तूं आपला हात लांब करीत असतां,
आपल्या दासांनीं पूर्ण धैर्यानें तुझें वचन सांगावें
असें कर; तुझा पवित्र सेवक येशू याच्या नामानें
चिन्हें व अद्भुतें घडावीं असेंहि कर; ३१ आणि
त्यांनीं प्रार्थना केल्यावर ज्या जागेमध्यें ते जमले होते
तीं कंपित झाली; आणि ते सर्व पवित्र आत्म्यानें
पूर्ण होऊन देवाचें वचन धैर्यानें बोलूं लागले.

## समाईक फंड

३२ तेव्हां विश्वास धरणाऱ्यांचा समुदाय एक-
दिलाचा व एकजिवाचा होता. कोणीहि आपल्या माल-
मत्तेंतील कांहीं आपलें आहे असें म्हणत नसे, तर
त्यांचे सर्व पदार्थ समाईक होते. ३३ प्रेषित मोठ्या
सामर्थ्यानें प्रभु येशूच्या पुनरुत्थानाविषयीं साक्ष देत
होते; आणि त्या सर्वांवर मोठी कृपा होती. ३४
त्यांच्यांतील कोणालाहि उणें नव्हतें, कारण जमिनींचे
किंवा घरांचे जितके मालक होते तितक्यांनीं तीं
विकून टाकून विकलेल्या वस्तूंचें मोल आणून ३५
प्रेषितांच्या चरणीं ठेवावें; मग जसजशी कोणाला
गरज लागत असे तसतसें प्रत्येकाला वांटून देण्यांत
येत असे.

३६ तेव्हां कुप्र बेटांत जन्मलेला लेवी योसेफ,
ज्याला प्रेषितांनीं बर्णबा म्हणजे बोधपुत्र असें नांव
दिलें होतें, त्याची जमीन होती; ३७ ती त्यानें
विकली व तिचे पैसे आणून प्रेषितांच्या चरणीं ठेविले.

## हनन्या व सप्पीरा

५ १ कोणी हनन्या नांवाचा एक इसम व
त्याची बायको सप्पीरा यांनीं आपली मालमत्ता
विकली. २ मग त्यानें किंमतींतून कांहीं भाग
बायकोच्या संमतीनें मागें ठेविला व कांहीं भाग
आणून प्रेषितांच्या चरणीं ठेविला. ३ तेव्हां पेत्र
म्हणाला, हनन्या, तूं पवित्र आत्म्याबरोबर लबाडी
करावी व जमिनीच्या किंमतींतून कांहीं ठेवून
घ्यावें म्हणून सैतानानें तुझें मन कां भरविलें आहे?
४ ती होती तोंवर तुझी स्वतःची व विकल्यावर
तुझ्या स्वाधीन नव्हती काय? हें करण्याचें आपल्या
मनांत तूं कां आणिलें? तूं मनुष्यांशीं नाहीं तर
देवाशीं लबाडी केली. ५ हे शब्द ऐकून हनन्यानें खालीं
पडून प्राण सोडिला; आणि हें ऐकणाऱ्या सर्वांस मोठें भय
प्राप्त झालें. ६ नंतर तरुणांनीं उठून त्याला गुंडाळिलें व
बाहेर नेऊन पुरिलें.

७ मग असें झालें कीं सुमारें प्रहराच्या अंतरानें त्याची

बायको आंत आली तेव्हां झालेलें वर्तमान तिला समजलें नव्हतें. ८ पेत्र तिला म्हणाला, मला सांग, एवढ्याला तुम्हीं जमीन विकली काय? तिनें उत्तर केलें, होय एवढ्यालाच. ९ पेत्र तिला म्हणाला, प्रभूच्या आत्म्याची परीक्षा पाहण्यास तुम्हीं एकोपा कां केला? पाहा, ज्यांनीं तुझ्या नवऱ्याला पुरिलें त्यांचे पाय दाराशींच आहेत; ते तुलाहि उचलून बाहेर नेतील. १० तेव्हां लागलेंच तिनें त्याच्या पायांजवळ पडून प्राण सोडिला; आणि तरुणांनीं आंत येऊन तिला मेलेलें पाहून तिला बाहेर नेऊन तिच्या नवऱ्याजवळ पुरिलें. ११ यावरून सर्व मंडळीला व हें ऐकणाऱ्या सर्वांस मोठें भय प्राप्त झालें.

## प्रेषितांनीं केलेलीं अद्भुतें

१२ प्रेषितांच्या हातांनीं लोकांमध्यें पुष्कळ चिन्हें व अद्भुतें घडत असत; आणि ते सर्व एकचित्तानें शलमोनाच्या देवडींत जमत असत; लोक त्यांस थोर मानीत; १३ तरी त्यांच्यांत सामील होण्यास इतर कोणाचें धैर्य झालें नाहीं. १४ विश्वास धरणारे पुष्कळ पुरुष व स्त्रिया यांचा समुदाय उत्तरोत्तर प्रभूकडचा झाला; १५ इतकें कीं लोकांनीं दुखणेकऱ्यांस मार्गांत आणून बाजांवर व पलंगांवर ठेवावें, यासाठीं कीं पेत्र येत असतां त्याची सावली तरी त्यांच्यांतील कोणावर पडावी. १६ आणखी यरुशलेमाच्या आसपासच्या चोहोंकडल्या गांवांतून लोकसमुदाय दुखणेकऱ्यांस व अशुद्ध आत्म्यांनीं पीडलेल्यांस घेऊन तेथें येत; आणि ते सर्व बरे होत असत.

## धर्मसभेपुढें पुन्हां पेत्र व योहान

१७ तेव्हां मुख्य याजक व त्याच्याबरोबर असलेले सर्व सदोकपंथी ह्यांच्या मनांत मत्सर भरून ते उठले; १८ आणि त्यांनीं प्रेषितांवर हात टाकून त्यांस तुरुंगांत घातलें; १९ परंतु रात्रीं प्रभूच्या दूतानें तुरुंगाचे दरवाजे उघडिले व त्यांस बाहेर आणून म्हटलें, २० जा आणि मंदिरांत उभे राहून या जीवनाचीं सर्व वचनें लोकांस सांगा. २१ हें ऐकून ते पहाटेस मंदिरामध्यें जाऊन शिक्षण देऊं लागले. इकडे मुख्य याजक व त्याजबरोबर जे होते त्यांनीं येऊन धर्मसभा व इस्राएल लोकांचें वडीलमंडळ हीं एकत्र बोलाविलीं; आणि त्यांस आणावयास तुरुंगाकडे पाठविलें. २२ शिपाई तुरुंगांत गेले तों ते तेथें नाहींत असें पाहून त्यांनीं परत येऊन सांगितलें कीं २३ तुरुंग चांगल्या व्यवस्थेनें बंद केलेला, आणि दरवाजांत पहारेकरी उभे राहिलेले असें आम्हीं पाहिलें खरें, परंतु उघडल्यावर आम्हांस आंत कोणी सांपडलें नाहीं, २४ हें वर्तमान ऐकून यांचा काय परिणाम होईल याविषयीं मंदिराचा सरदार व मुख्य याजक घोटाळ्यांत पडले. २५ इतक्यांत कोणी येऊन त्यांस असें सांगितलें कीं पाहा, ज्या मनुष्यांस तुम्हीं तुरुंगांत ठेविलें होतें ते मंदिरांत उभें राहून लोकांस शिक्षण देत आहेत. २६ तेव्हां सरदारानें शिपायांसह जाऊन त्यांस जुलूम न करितां आणिलें; कारण लोक आपणांला दगडमार करितील असें त्यांस भय होतें. २७ त्यांनीं त्यांस आणून धर्मसभेपुढें उभें केलें. तेव्हां मुख्य याजकानें त्यांस विचारिलें, २८ या नामानें शिक्षण देऊं नका असें आम्हीं तुम्हांस निक्षून सांगितलें कीं नाहीं? तरी पाहा, तुम्हीं आपल्या शिकवणीनें यरुशलेम भरून टाकिलें आहे, आणि या माणसाच्या रक्तपाताचा दोष आम्हांवर आणावयास पाहतां. २९ तेव्हां पेत्रानें व इतर प्रेषितांनीं उत्तर केलें, आम्हीं मनुष्यापेक्षां देवाला मानिलें पाहिजे. ३० ज्याला तुम्हीं खांबावर टांगून मारिलें त्या येशूला आमच्या पूर्वजांच्या देवानें उठविलें; ३१ त्यानें इस्राएलाला पश्चात्ताप व पापांची क्षमा ही देणगी द्यावी म्हणून देवानें त्याला आपल्या उजव्या हस्तें राजा व तारणारा असें उच्च केलें. या गोष्टीविषयीं आम्ही त्याचे साक्षी आहों; ३२ आणि जो पवित्र आत्मा देवानें आपल्या आज्ञा पाळणाऱ्यांस दिला आहे तोहि साक्षी आहे.

३३ हें ऐकून ते इतके चिडले कीं त्यांनीं त्यांस जिवें मारण्याचें मनांत आणिलें. ३४ तेव्हां सर्व लोकांमध्यें प्रतिष्ठित असा मानलेला गमलियेल नांवाचा एक परूशी शास्त्राध्यापक होता; त्यानें धर्मसभेंत उभें राहून त्या मनुष्यांस जरासें बाहेर काढावयास सांगितलें. ३५ मग तो त्यांस म्हणाला, अहो इस्राएल लोकांनो, तुम्ही या मनुष्यांचें काय करणार याविषयीं आपणांस संभाळा. ३६ कारण कांहीं दिवसांपूर्वी थुदास हा पुढें येऊन मी कोणी तरी आहें असें म्हणूं लागला; त्याला सुमारें चारशें माणसें मिळालीं; तो मारला गेला आणि जितके त्याला मानीत होते त्या

सर्वांची दाणादाण होऊन ते नाहींतसे झाले. ३७ त्याच्या मागून गालीलकर यहूदा नांवनिशी होण्याच्या दिवसांत पुढें आला व त्यानें पुष्कळ लोकांस फितवून आपल्या नादीं लाविलें; त्याचाहि नाश झाला; व जितके त्याला मानीत होते त्या सर्वांची दाणादाण झाली; ३८ म्हणून मी तुम्हांस आतां सांगतों, या माणसांपासून दूर राहा व त्यांच्या वाटेस जाऊं नका; कारण हा बेत व हें काम मनुष्यांचें असल्यास नष्ट होईल; ३९ परंतु देवाचें असल्यास तुमच्यानें तें नष्ट करवणार नाहीं; तुम्ही देवाचे विरोधी मात्र ठराल. ४० तेव्हां त्यांनीं त्याचें सांगणें मान्य केलें; त्यांनीं प्रेषितांस बोलावून फटके मारविले, आणि येशूच्या नामानें बोलूं नका अशी ताकीद देऊन त्यांस सोडून दिलें. ४१ ते तर आपण त्याच्या नामासाठीं अवमानास योग्य ठरलों यामुळें आनंदित होऊन धर्मसभेपुढून निघाले; ४२ आणि येशू हा ख्रिस्त आहे असें ते मंदिरांत व घरोघरीं नित्य शिकवितां व सुवार्ता गाजवितां राहिले नाहींत.

## सात सेवकांची निवड

६ १ त्या काळीं शिष्यांची संख्या वाढत चालली असतां हेल्लेणी यहूद्यांनीं इब्री लोकांसंबंधानें कुरकूर केली; कारण रोजच्या वांटणींत त्यांच्या विधवांची उपेक्षा होत असे. २ तेव्हां बारा जणांनीं शिष्यगणाला बोलावून म्हटलें, आम्हीं देवाचें वचन सांगण्याची सेवा सोडून पंक्तिसेवा करावी हें आम्हांस बरें वाटत नाहीं. ३ तर बंधुजनहो, तुम्ही आपल्यामधून पवित्र आत्म्यानें व ज्ञानानें पूर्ण अशीं सात प्रतिष्ठित मनुष्यें शोधून काढा, त्यांस आम्ही या कामावर नेमूं; ४ म्हणजे आम्ही प्रार्थनेंत व वचनसेवेंत तत्पर राहूं. ५ ही गोष्ट सर्व लोकांना बरी वाटली; नंतर विश्वासानें व पवित्र आत्म्यानें पूर्ण असा स्तेफन, आणि फिलिप्प, प्रखर, नीकानुर, तीमोन, पार्मिना व यहूदीयमतानुसारी नीकलाव अंत्युखीयकर यांस त्यांनीं निवडिलें; ६ त्यांस त्यांनीं प्रेषितांसमोर उभें केलें; आणि त्यांनीं प्रार्थना करून त्यांजवर हात ठेविले.

७ मग देवाच्या वचनाचा प्रसार झाला; यरुशलेमांत शिष्यांची संख्या फार वाढली; याजकवर्गांतील पुष्कळ लोकांनीं या विश्वासाला मान्यता दिली.

## स्तेफनावर हल्ला

८ स्तेफन कृपा व सामर्थ्य यांहीं पूर्ण होत्साता लोकांत मोठीं अद्भुतें व चिन्हें करीत असे. ९ तेव्हां लीबिर्तिन नामक लोकांची सभा, कुरेनेकर, आलेक्सांद्रियेकर आणि किलिकिया व आसिया यांतील लोकांपैकीं कितीएक इसम उठून स्तेफनाबरोबर वादविवाद करूं लागले; १० पण तो ज्या ज्ञानानें व ज्या आत्म्यानें बोलला त्यांस त्यांच्यानें तोंड देववेना. ११ तेव्हां त्यांनीं कांहीं लोकांस भर देऊन, आम्हीं याला मोशे व देव यांजविरुद्ध दुर्भाषण करितां ऐकलें असे म्हणण्यास लाविलें; १२ आणि त्यांनीं लोकांस, वडिलांस व शास्त्र्यांस चेतविलें. त्यांनीं त्याजवर चाल करून त्याला धरून धर्मसभेंत नेलें; १३ आणि त्यांनीं पुढें उभे केलेले खोटे साक्षी म्हणाले, हा माणूस या पवित्रस्थानाच्या व नियमशास्त्राच्या विरुद्ध बोलण्याचें सोडीत नाहीं; १४ आम्हीं त्याला असें बोलतांना ऐकलें कीं हा नासोरी येशू हें स्थान मोडून टाकील आणि मोशानें आपल्याला लावून दिलेले परिपाठ बदलून टाकील. १५ तेव्हां धर्मसभेंत बसलेले सर्व त्याजकडे निरखून पाहत असतां त्यांस त्याचें मुख देवदूताच्या मुखासारिखें दिसलें.

## स्तेफनाचें भाषण

७ १ मग मुख्य याजक म्हणाला, या गोष्टी अशाच आहेत काय? २ तेव्हां तो म्हणाला, बंधुजनहो व वडील मंडळींनो; ऐका. आपला पूर्वज अब्राहाम हारान प्रांतांत जाऊन राहण्यापूर्वी मेसोपटेम्या देशांत असतां गौरवी देवानें त्याला दर्शन देऊन म्हटलें, ३ तूं आपला देश व आपले नातलग सोडून मी तुला दाखवीन त्या देशांत ये. ४ तेव्हां तो खास्द्यांच्या देशांतून निघून हारानांत जाऊन राहिला; मग त्याचा बाप मेल्यावर देवानें त्याला तेथून आणून सध्यां तुम्ही राहतां या देशांत ठेविलें; ५ पण त्यांत त्याला वतन दिलें नाहीं, पाऊलभर जमीन देखील नाहीं; तथापि त्याला मूलबाळ नसतां देवानें वचन दिलें कीं हा देश तुझा व तुझ्यामागें तुझ्या संततीचा असा मी करीन. ६ देवानें आणखी असें सांगितलें कीं तुझी संतति परदेशांत जाऊन उपरी होईल, आणि ते लोक त्यांस दास करून चारशें वर्षें जाचतील. ७ ज्यांचें दास्य ते

करीत असतील त्या लोकांचें पारिपत्य मी करीन, असें देवानें
सांगितलें; आणि त्यानंतर ते तेथून निघून माझी सेवा या
ठिकाणीं करितील असेंहि म्हटलें. ८ त्यानें त्यास सुंतेचा करार
लावून दिला; हा करार झाल्यानंतर त्याला इसहाक झाला;
त्याची त्यानें आठव्या दिवशीं सुंता केली; मग इसहाकाला
याकोब झाला व याकोबास बारा कुलाधिपति झाले. ९ नंतर
कुलाधिपतींनीं हेव्यामुळें योसेफाला मिसर देशांत विकून
टाकिलें; पण देव त्यासह होता. त्यानें त्यावरील सर्व संकटां-
तून त्याला सोडविलें; १० आणि मिसर देशाचा राजा फारो
याच्या दृष्टीनें ज्ञाता व त्याच्या कृपेंतला असें केलें; यावर
त्यानें मिसर देशावर व आपल्या सर्व घरावर त्याला अधि-
कारी केलें. ११ मग सर्व मिसर देशांत व कनान देशांत
दुष्काळ पडून जबर संकट आलें; आणि आपल्या पूर्वजांस
अन्न मिळेना. १२ तेव्हां मिसर देशांत धान्य आहे हें
ऐकून याकोबानें तुमच्याआमच्या पूर्वजांस पहिल्यानें पाठ-
विलें. १३ मग दुसऱ्या खेपेस योसेफाची व त्याच्या
भावांची ओळख झाली; आणि योसेफाचें कुळ फारो राजाला
कळलें. १४ तेव्हां योसेफानें, आपला बाप याकोब व
आपले सगळे नातलग, म्हणजे पंचाहत्तर असामी, यांस
बोलावणें पाठवून आणविलें. १५ याप्रमाणें याकोब मिसर
देशांत गेला; आणि तेथें तो व आपले पूर्वज मरण पावले;
१६ त्यांस शखेमांत नेलें आणि जी कबर अब्राहामानें
शखेमांत हमोर याच्या पुत्रांपासून रोख रुपये देऊन विकत
घेतलेली होती तींत त्यांस पुरिलें. १७ मग देवानें
अब्राहामाला जें वचन दिलें होतें त्याचा समय जसा-
जसा जवळ आला तसतसे ते लोक, १८ योसेफाची
माहिती नसलेला असा दुसरा राजा मिसर देशाच्या गादीवर
बसेपर्यंत, मिसर देशांत वाढून संख्येनें पुष्कळ झाले.
१९ तो राजा तुमच्याआमच्या लोकांबरोबर कपटानें
वागला आणि त्यांचीं बाळकें वांचूं नयेत म्हणून तीं बाहेर
टाकून देणें त्यानें त्यांस भाग पाडिलें; असा त्यानें आपल्या
पूर्वजांचा छळ केला. २० त्या दिवसांत मोशे जन्मला,
तो अतिशय सुंदर होता; त्याचें पालनपोषण तीन महिने-
पर्यंत त्याच्या बापाच्या घरीं झालें; २१ मग त्याला
बाहेर टाकण्यांत आलें असतां फारोच्या कन्येनें त्याला
घेऊन आपला पुत्र म्हणून पाळिलें. २२ मोशाला
मिसरी लोकांच्या सर्व विद्यांचें शिक्षण मिळालें; आणि तो
भाषणांत व कृतींत पराक्रमी होता. २३ मग त्याला
चाळिसावें वर्ष लागलें तेव्हां त्याच्या मनांत आलें कीं
आपले बंधुजन म्हणजे इस्राएलाचें संतान यांची भेट
घ्यावी. २४ एकदा त्यांतील कोणाएकाचा अन्याय होत
आहे असें पाहून मोशानें त्याचा कैवार घेतला, आणि
मिसऱ्याला मारून त्या जाचलेल्या इसमाची दाद
लाविली. २५ तेव्हां आपल्या हातानें निजबांधवांची देव
कशी सुटका करीत आहे हें त्यांस समजेल म्हणून त्याला
वाटलें होतें, पण त्यांस समजले नाहीं. २६ मग दुसऱ्या
दिवशीं कोणी भांडत असतां, तो त्यांच्यापुढें येऊन त्यांची
समजूत करण्याकरितां म्हणाला, गृहस्थांनो, तुम्ही भाऊबंद
आहां; एकमेकांचा अन्याय कां करितां? २७ तेव्हां जो
आपल्या शेजाऱ्याचा अन्याय करीत होता तो त्याला
ढकलून देऊन म्हणाला, तुला आम्हांवर अधिकारी व
न्यायाधीश कोणीं केलें? २८ काल तूं मिसऱ्याला ठार
मारिलें तसें मलाहि मारावयास पाहतोस काय? २९ हे
शब्द ऐकतांच मोशे पळून गेला, आणि मिद्यान देशांत
प्रवासी असा झाला; तेथें त्याला दोन पुत्र झाले. ३० मग
चाळीस वर्षें भरल्यावर सीनाय डोंगराच्या रानांत, एका
झुडपांतील अग्निज्वालांत त्याच्या दृष्टीस एक देवदूत
पडला. ३१ हें पाहून मोशाला त्याचें आश्चर्य वाटलें;
आणि काय तें नीट पाहण्याकरितां तो जवळ गेला, तेव्हां
प्रभूची वाणी अशी झाली कीं ३२ मी तुझ्या पूर्वजांचा
देव, म्हणजे अब्राहामाचा, इसहाकाचा व याकोबाचा देव
आहे. तेव्हां मोशे कंपित होऊन त्याला पाहावयाचें धैर्य
झालें नाहीं. ३३ नंतर प्रभूनें त्याला म्हटलें, तूं आपल्या
पायांतला जोडा काढ; कां तर ज्या जागेवर तूं उभा
राहिला आहेस ती पवित्र भूमि आहे. ३४ मिसर देशां-
तल्या माझ्या लोकांची विपत्ति मीं खचीत पाहिली आहे,
त्यांचें कण्हणें ऐकलें आहे, आणि त्यांस सोडविण्यास मी
उतरलों आहें; तर आतां ये, मी तुला मिसर देशांत
पाठवितों. ३५ तुला अधिकारी किंवा न्यायाधीश कोणीं
केलें, असें ज्या मोशाला ते अडवून बोलले होते, त्याला

झुडपांत दर्शन झालेल्या देवदूताच्या हस्तें, देवानें अधिकारी व मुक्तिदाता असें करून पाठविलें. ३६ त्यानें मिसर देशांत, तांबड्या समुद्रांत व अरण्यांत चाळीस वर्षें अद्भुतें व चिन्हें करून त्या लोकांस काढून पुढें नेलें. ३७ तोच मोशे इस्राएल लोकांस म्हणाला, 'देव तुमच्या बांधवांत माझ्यासारखा संदेष्टा तुम्हांसाठीं उत्पन्न करील.' ३८ रानांतील मंडळीमध्यें सीनाय पर्वतावर त्याच्याशीं बोलणाऱ्या देवदूताबरोबर आणि आपल्या पूर्वजांबरोबर जो होता तो हाच आहे; त्यालाच तुम्हांआम्हांला देण्याकरितां जिवंत वचनें मिळालीं; ३९ त्याचें ऐकावयास आपले पूर्वज मान्य नव्हते; तर त्यांनीं त्याला धिक्कारिलें व आपलें मन मिसर देशाकडे फिरवून ४० ते अहरोनाला म्हणाले, आमच्यापुढें चालतील असे देव आम्हांस करून दे; कारण ज्यानें आम्हांस मिसर देशांतून आणिलें त्या या मोशाचें काय झालें हें आम्हांस कळत नाहीं. ४१ मग त्या दिवसांत त्यांनीं बैलाची मूर्ति बनवून व तिला यज्ञ करून आपल्या हातच्या कृतीबद्दल उत्साह केला. ४२ तेव्हां देवानें विमुख होऊन त्यांस आकाशांतील सेनागणाची सेवा करावयास सोडून दिलें; याविषयीं संदेष्ट्यांच्या पुस्तकांत लिहिलें आहे:

हे इस्राएलाच्या घराण्या, तुम्हीं चाळीस वर्षें
अरण्यांत यज्ञ व बलिदानें मला केलीं काय?
४३ मोलखाचा मंडप व रेफान दैवत यांचा तारा
तुम्हीं उचलून घेतला,
म्हणजे ज्या मूर्ति तुम्हीं पुजण्याकरितां केल्या त्या;
मी तुम्हांला बाबेलच्या पलीकडे नेऊन ठेवीन.

४४ तूं जो नमुना पाहिला त्याप्रमाणें आज्ञापटाचा निवासमंडप कर, असें ज्यानें मोशाला सांगितलें त्यानें नेमल्याप्रमाणें तो मंडप रानांत आपल्या पूर्वजांचा होता. ४५ जीं राष्ट्रें देवानें त्यांच्यासमोरून घालविलीं, त्यांचा देश आपल्या पूर्वजांनीं स्वाधीन करून घेतला, तेव्हां हा जो मंडप आपले पूर्वज दाविदाच्या दिवसापर्यंत परंपरेनें प्राप्त करून घेत आले तो त्यांनीं यहोशवाबरोबर देशांत आणिला. ४६ दाविदावर देवाची कृपादृष्टि झाली, आणि त्यानें याकोबाच्या देवासाठीं निवासस्थान बांधण्याची विनंति केली; ४७ परंतु तें गृह शलमोनानें त्याच्यासाठीं बांधिलें. ४८ तथापि जो परात्पर तो हातांनीं बांधलेल्या घरांत राहत नाहीं; संदेष्ट्यानें म्हटलें आहे: ४९ प्रभु म्हणतो, आकाश माझें राजासन आहे,

पृथ्वी माझें पादासन आहे;
तुम्ही माझ्यासाठीं कशा प्रकारचें घर बांधणार?
किंवा माझ्या विसाव्याचें स्थान कोणतें?
५० माझ्या हातानें ह्या सर्व वस्तु केल्या नाहींत काय?

५१ अहो ताठ मानेच्या आणि हृदयांनीं व कानांनीं बेसुंती लोकांनो, तुम्ही पवित्र आत्म्याला सर्वदा अडवितां; जसे तुमचे पूर्वज तसे तुम्हीहि. ५२ ज्याचा तुमच्या पूर्वजांनीं पाठलाग केला नाहीं असा संदेष्ट्यांपैकीं कोण होता बरें? ज्यांनीं त्या नीतिवान् पुरुषाच्या आगमनाविषयीं पूर्वी सांगितलें त्यांस त्यांनीं जिवें मारिलें; त्याला धरून देणारे व जिवें मारणारे असे आतां तुम्ही निघालां; ५३ ज्या तुम्हांस देवदूतांच्या योगें योजलेलें नियमशास्त्र प्राप्त झालें त्या तुम्हीं तें पाळिलें नाहीं.

## स्तेफनाचा मृत्यु

५४ त्याचें हें भाषण त्यांच्या अंतःकरणास इतकें झोंबलें कीं ते त्याजवर दांतओठ खाऊं लागले; ५५ परंतु पवित्र आत्म्यानें पूर्ण होऊन त्यानें आकाशाकडे दृष्टि लाविली, तेव्हां देवाचें तेज व देवाच्या उजवीकडे येशूला उभें राहिलेलें त्यानें पाहिलें, आणि म्हटलें कीं पाहा, ५६ आकाश उघडलें आहे, व मनुष्याचा पुत्र देवाच्या उजवीकडे उभा राहिला आहे असें माझ्या दृष्टीस पडतें. ५७ तेव्हां ते मोठी आरोळी मारून व कान बंद करून एकचित्तानें त्याच्या अंगावर तुटून पडले. ५८ मग ते त्याला शहराबाहेर घालवून दगडमार करूं लागले; आणि साक्षीदारांनीं आपलीं वस्त्रें शौल नामक एका तरुणाच्या पायांजवळ ठेविलीं; ५९ तेव्हां ते स्तेफनाला दगडमार करीत असतां तो प्रभूचा धावा करीत म्हणाला, हे प्रभू येशू, माझ्या आत्म्याचा स्वीकार कर. ६० मग गुडघे टेकून तो मोठ्यानें ओरडला, हे प्रभू, हें पाप त्यांकडे मोजूं नको. असें बोलून तो झोपीं गेला.

### ख्रिस्ती लोकांचा छळ आणि पांगापांग

१ त्याच्या वधाविषयीं शौल मान्य होता.
८ त्या दिवसांत यरुशलेमांतल्या मंडळीचा मोठा पाठलाग
झाला; म्हणून प्रेषितांखेरीज ते सर्व यहूदीया
व शोमरोन या प्रदेशांत पांगून गेले. २ स्तेफनाला
धार्मिक मनुष्यांनीं नेऊन पुरिलें, आणि त्याजसाठीं मोठा
शोक केला. ३ इकडे शौलानें मंडळीस हैराण करून टाकिलें,
तो घरोघर जाऊन पुरुषांस व स्त्रियांसहि धरून आणून
तुरुंगांत टाकीत असे.

### शोमरोनामध्यें फिलिप्प

४ तेव्हां जे पांगून गेले ते वचनाची सुवार्ता
सांगत देशांतून फिरले, ५ आणि फिलिप्पानें शोमरोन
शहरीं जाऊन त्यांस ख्रिस्ताची घोषणा केली. ६
तेव्हां लोकसमुदायांनीं ऐकून व फिलिप्प दाखवीत
होता तीं चिन्हें पाहून त्यानें सांगितलेल्या गोष्टींकडे
एकमतानें लक्ष दिलें. ७ ज्यांस अशुद्ध आत्मे लागले
होते त्यांच्यांतील पुष्कळांतून ते अशुद्ध आत्मे मोठ्यानें
ओरडून निघून गेले; पुष्कळ पक्षघाती व पांगळीं
मनुष्यें बरीं झालीं; ८ आणि त्या नगरांत फार आनंद झाला.

### शिमोन जादूगार

९ त्या नगरांत जादूगिरी करून शोमरोनी लोकांस
थक्क करणारा असा शिमोन नांवाचा कोणीएक मनुष्य
होता, आणि मी कोणी मोठा आहें असें तो सांगत
असे. १० सर्व लहानथोर त्याचें लक्षपूर्वक ऐकून
बोलत असत कीं जिला देवाची महाशक्ति म्हणतात ती
हा आहे. ११ त्यानें त्यांस दीर्घकाळापासून आपल्या
जादूगिरीनें थक्क केलें होतें, म्हणून त्यांचें लक्ष त्याजकडे
होतें; १२ तरी फिलिप्प देवाचें राज्य व येशू ख्रिस्ताचें
नाम यांविषयींची सुवार्ता सांगत होता तेव्हां लोकांनीं
विश्वास धरिला; आणि पुरुष व स्त्रिया यांचा बाप्तिस्मा झाला.
१३ शिमोनानेंहि स्वतः विश्वास धरिला व बाप्तिस्मा घेऊन
तो फिलिप्पाच्या सहवासांत राहिला; आणि जीं चिन्हें
व मोठीं अद्भुत कृत्यें घडलीं तीं पाहून तो थक्क झाला.

### शोमरोनामध्यें पेत्र व योहान

१४ नंतर शोमरोनानें देवाचें वचन स्वीकारिलें
असें यरुशलेमांतल्या प्रेषितांनीं ऐकून त्यांजकडे पेत्र व
योहान यांस पाठविलें; १५ ते तेथें आल्यावर त्यांनीं,
त्यांस पवित्र आत्मा मिळावा म्हणून, त्यांजसाठीं प्रार्थना
केली; १६ कारण तोंपर्यंत त्यांच्यांतील कोणावरहि तो आला
नव्हता; केवळ प्रभु येशूच्या नामांत त्यांचा बाप्तिस्मा
झाला होता. १७ तेव्हां त्यांनीं त्यांजवर आपले हात
ठेविले आणि त्यांस पवित्र आत्मा मिळाला. १८ नंतर
प्रेषितांचे हात ठेविल्यानें पवित्र आत्मा मिळतो हें
शिमोनानें पाहून त्यांस द्रव्य दाखवून म्हटलें, १९ ज्या
कोणावर मी आपले हात ठेवीन त्याला पवित्र आत्मा
मिळावा असा अधिकार मलाहि द्या. २० तेव्हां पेत्र
त्याला म्हणाला, तुझ्या रुप्याचा तुझ्याबरोबर नाश होवो,
कारण देवाचें दान पैक्यानें मिळवावयाचा तूं विचार
केला. २१ या गोष्टींत तुला भाग किंवा वांटा नाहीं;
कारण तुझें अंतःकरण देवाच्या दृष्टीनें नीट नाहीं. २२
तूं या आपल्या दुष्टतेचा पश्चात्ताप करून प्रभूची प्रार्थना
कर, म्हणजे तुझ्या अंतःकरणांतल्या कल्पनेची तुला
कदाचित् क्षमा होईल; २३ कारण तूं अतिशय कडू-
पणांत व अधर्माच्या बंधनांत आहेस असें माझ्या
दृष्टीस येतें. २४ तेव्हां शिमोनानें म्हटलें, तुम्हीं सांगि-
तलेल्या गोष्टींपैकीं कांहीं मजवर येऊं नये म्हणून तुम्हीच
माझ्यासाठीं प्रभूची प्रार्थना करा.

२५ नंतर त्यांनीं साक्ष देऊन प्रभूचें वचन गाज-
विल्यावर ते यरुशलेमांत परत आले; तेव्हां त्यांनीं
शोमरोनी लोकांच्या पुष्कळशा गांवांतून सुवार्ता सांगितली.

### फिलिप्प व हबशी षंढ

२६ नंतर प्रभूच्या दूतानें फिलिप्पाला म्हटलें, ऊठ
जी वाट यरुशलेमापासून गज्जाकडे जाते त्या वाटे
म्हणजे दक्षिणेकडे जा; ती रान आहे. २७ मग तो
उठून निघाला; आणि पाहा, एक कूशी[1] षंढ, कूशी लोकांची
राणी कांदके हिचा मोठा अधिकारी होता व त्याच्या हातीं
तिचें सर्व भांडार होतें; तो यरुशलेमांत भजनासाठीं
आला होता; २८ तो परत जातांना आपल्या रथांत
बसून यशया संदेष्ट्याचा ग्रंथ वाचीत होता. २९

[1] एथिओपियन किंवा हबशी.

तेव्हां फिलिप्पाला आत्म्यानें सांगितलें, तूं जाऊन
त्याचा रथ गांठ. ३० फिलिप्प धावत गेला तेव्हां
त्यानें त्याला यशया संदेष्ट्याचा ग्रंथ वाचतांना ऐकलें;
त्यावर तो म्हणाला, आपण जें वाचीत आहां तें
आपणास समजतें काय? ३१ त्यानें म्हटलें, कोणीं
मार्ग दाखविल्यावांचून मला कसें समजेल? मग
त्यानें फिलिप्पाला आपल्याजवळ बसावयाला वर
बोलाविलें. ३२ तो जो शास्त्रलेख वाचीत होता तो
हा होता:

त्याला मेंढरासारिखें वधासाठीं नेलें;
आणि जसें कोंकरूं
आपल्या कातरणाऱ्याच्या पुढें गप्प असतें,
तसा तो आपलें तोंड उघडीत नाहीं;
३३ त्याच्या लीन अवस्थेंत त्याला न्याय मिळाला
नाहीं;
त्याच्या पिढीचें वर्णन कोण करील?
कारण त्याचा जीव पृथ्वीवरून घेतला गेला.

३४ तेव्हां षंढानें फिलिप्पाला म्हटलें, संदेष्टा कोणा-
विषयीं असें म्हणतो, स्वतःविषयीं किंवा दुसऱ्या
कोणाविषयीं, हें मला सांगाल का? ३५ तेव्हां फिलि-
प्पानें बोलावयास आरंभ केला व या लेखापासून
सुरुवात करून येशूवी सुवार्ता त्याला सांगितली. ३६
मग वाटेनें जात असतां ते एका जलसंचयाजवळ
आले, तेव्हां षंढ म्हणाला, पाहा हें पाणी; मला
बाप्तिस्मा घेण्यास काय अडचण? ३७ (फिलिप्पानें
म्हटलें, जर आपण आपल्या सर्व अंतःकरणानें विश्वास
धरितां तर योग्य आहे. तेव्हां त्यानें उत्तर दिलें,
येशू ख्रिस्त देवाचा पुत्र आहे असा मी विश्वास
धरितों.) ३८ तेव्हां त्यानें रथ उभा करावयास
सांगितलें; मग फिलिप्प व षंढ असे ते उभयतां
पाण्यांत उतरले; आणि त्यानें त्याला बाप्तिस्मा दिला.
३९ मग ते पाण्यांतून वर आले तेव्हां प्रभूचा आत्मा
फिलिप्पाला घेऊन गेला; म्हणून तो पुनः षंढाच्या
दृष्टीस पडला नाहीं; नंतर तो आपल्या वाटेनें हर्ष
करीत चालला. ४० इकडे फिलिप्प अजोत नगरांत
आढळला; आणि कैसरीया एथें येईपर्यंत त्याला वाटेंत
जीं गांवें लागलीं त्यांतून जातांना त्यानें सुवार्ता
सांगितली.

## शौलाचें धर्मांतर

**९** १ ह्या वेळपर्यंत शौल प्रभूच्या शिष्यांस
धमकावण्या दाखविणें व त्यांचा घात करणें या-
विषयीं फार आवेशी होता. २ त्यानें प्रमुख
याजकाकडे जाऊन त्याजपासून दिमिष्कांतल्या धर्मसभांस
अशीं पत्रें मागितलीं कीं त्या मार्गाचे अनुसारी पुरुष
किंवा स्त्रिया त्यास आढळल्यास त्यानें त्यांस बांधून
यरुशलेमास आणावें. ३ मग जातां जातां असें झालें
कीं तो दिमिष्काजवळ पोहंचला; त्या वेळीं अकस्मात्
त्याच्यासभोंवतीं आकाशांतून प्रकाश चमकला. ४ तेव्हां
तो भूमीवर पडला, आणि त्यानें अशी वाणी आपणा-
बरोबर बोलतां ऐकली, शौला, शौला, माझा छळ कां करि-
तोस? ५ तेव्हां तो म्हणाला, प्रभो, तूं कोण
आहेस? त्यानें म्हटलें, ज्या येशूचा तूं छळ करितोस
तोच मी आहें; ६ तर ऊठ, व नगरांत जा, म्हणजे
तुला जें करावयाचें तें सांगण्यांत येईल. ७ त्याच्या-
बरोबर जीं मनुष्यें जात होतीं तीं स्तब्ध उभीं
राहिलीं. त्यांनीं ध्वनि ऐकला खरा, पण त्यांच्या दृष्टीस
कोणी पडलें नाहीं. ८ मग शौलानें भूमीवरून उठून
डोळे उघडले तों त्याला दिसेनासें झालें; तेव्हां त्यांनीं
त्याला हातीं धरून दिमिष्कांत नेलें. ९ तेथें तो तीन
दिवस अंधळा होता व त्यानें कांहीं खाल्लेंप्यालें नाहीं.

## दिमिष्कामध्यें शौल

१० इकडे दिमिष्कांत हनन्या नांवाचा कोणीएक
शिष्य होता; त्याला प्रभु दृष्टांतांत म्हणाला, हे हनन्या;
त्यानें म्हटलें, काय प्रभु? ११ प्रभु त्याला म्हणाला,
उठून नीट नांवाच्या रस्त्यावर जा, आणि यहूदाच्या
घरीं तार्सकर शौल नांवाच्या मनुष्याचा शोध कर;
कारण पाहा, तो प्रार्थना करीत आहे; १२ आणि
हनन्या नांवाच्या कोणा मनुष्यानें आंत येऊन डोळे
नीट होण्यासाठीं आपणावर हात ठेविले असें त्यानें
पाहिलें आहे. १३ तेव्हां हनन्यानें उत्तर केलें, प्रभो,

यरुशलेमांतल्या तुझ्या पवित्र जनांचें ह्या मनुष्यानें किती वाईट केलें आहे हें पुष्कळांच्या तोंडून मीं ऐकलें आहे; १४ आणि एथेंहि तुझें नाम घेणाऱ्या सर्वांस बांधावें असा मुख्य याजकांपासून त्याला अधिकार मिळाला आहे. १५ तेव्हां प्रभूनें त्याला म्हटलें, जा; कारण विदेशी लोक, राजे व इस्राएलाची संतति यांच्यासमोर माझें नाम घेऊन जाण्याकरितां तो माझें निवडलेलें पात्र आहे; १६ आणि त्याला माझ्या नामासाठीं किती दुःख सोसावें लागेल हें मी त्याला दाखवीन. १७ तेव्हां हनन्या निघून त्या घरीं गेला; आणि त्याजवर हात ठेवून म्हणाला, शौलभाऊ, तूं वाटेनें येत असतां ज्या प्रभूनें म्हणजे येशूनें तुला दर्शन दिलें त्यानें मला यासाठीं पाठविलें आहे कीं तुला आपली दृष्टि यावी व तूं पवित्र आत्म्यानें परिपूर्ण व्हावें. १८ तत्क्षणीं त्याच्या डोळ्यांवरून खपल्यांसारिखें कांहीं पडलें व त्याला दृष्टि आली; त्यानें उठून बाप्तिस्मा घेतला. १९ मग अन्न खाल्ल्यावर त्याला शक्ति आली.

ह्यानंतर तो दिमिष्कांतल्या शिष्यांच्या समागमांत कांहीं दिवस होता. २० त्यानें लागलेंच सभास्थानामध्यें येशूविषयीं गाजविलें कीं तो देवाचा पुत्र आहे. २१ तेव्हां सर्व ऐकणारे विस्मित होऊन बोलले, हें नाम घेणाऱ्यांचा जो यरुशलेमांत नाश करीत होता तो हाच नव्हे काय? ह्या तर त्यांस बांधून मुख्य याजकांकडे न्यावें म्हणूनच एथें आला होता; २२ पण शौलाला अधिक सामर्थ्य प्राप्त होत गेलें म्हणून त्यानें हाच ख्रिस्त आहे असें सिद्ध करून दिमिष्कांत राहणाऱ्या यहूदी लोकांस कुंठित केलें.

२३ असें पुष्कळ दिवस लोटल्यावर, यहूदी लोकांनीं त्याला जिवें मारावयाचा विचार मांडिला; २४ पण त्यांचा कट शौलाला समजला. ते त्याला मारावयाकरितां वेशींचे दरवाजे रात्रंदिवस राखीत होते; २५ परंतु त्याच्या शिष्यांनीं त्याला रात्रीस नेऊन पाटींत बसविलें आणि गांवकुसावरून खालीं उतरिलें.

## यरुशलेम व तार्स येथें शौल

२६ मग तो यरुशलेमांत आला तेव्हां त्यानें शिष्यांबरोबर मिळण्यामिसळण्याचा यत्न केला; परंतु हा शिष्य आहे असा विश्वास न धरितां ते सर्व त्याला भिऊं लागले. २७ तेव्हां बर्णबा त्याला प्रेषितांकडे घेऊन आला आणि त्याला वाटेंत प्रभूचें दर्शन कसें झालें, हा त्याच्याबरोबर कसा बोलला आणि दिमिष्कांत त्यानें येशूच्या नामानें धैर्यानें कसें भाषण केलें हें त्यानें त्यांस सांगितलें. २८ तेव्हां तो यरुशलेमांत कांहीं दिवस प्रभु येशूच्या नामानें धैर्यानें बोलत त्यांजबरोबर जातयेत असे; २९ आणखी हेल्लेणी यहूद्यांबरोबरहि वादविवाद करीत असे; तेव्हां ते त्याला मारावयास यत्न करूं लागले. ३० हें बंधुवर्गास समजल्यावर त्यांनीं त्याला कैसरीयांत नेऊन पुढें तार्सास पाठविलें.

३१ अशा प्रकारें सर्व यहूदीया, गालील व शोमरोन या प्रदेशांतील मंडळीस स्वस्थता प्राप्त झाली, आणि तिची वृद्धि होऊन ती प्रभूच्या भयांत व पवित्र आत्म्याच्या समाधानांत चालून वाढत गेली.

## लोद येथें पेत्र रोगी बरे करतो

३२ मग असें झालें कीं पेत्र सर्व पवित्र जनांत फिरत असतां लोद गांवांत जे राहत होते त्यांजकडेहि खालीं गेला. ३३ तेथें त्याला ऐन्या नांवाचा एक मनुष्य आढळला, त्याला पक्षघात झाल्यामुळें तो अंथरूण धरून आठ वर्षें पडला होता. ३४ त्याला पेत्रानें म्हटलें, ऐन्या, येशू ख्रिस्त तुला बरें करितो, ऊठ व आपलें अंथरूण नीट कर. तेव्हां तो तात्काळ उठला. ३५ नंतर लोद व शारोन यांतील सर्व राहणाऱ्यांनीं त्याला पाहिलें व ते प्रभूकडे वळले.

## दुर्कस

३६ आणखी यापोमध्यें टबीथा म्हणजे दुर्कस या नांवाची कोणीएक शिष्यीण होती; ती सत्कर्में करण्यांत व दानधर्म देण्यांत तत्पर असे. ३७ पुढें असें झालें कीं त्या दिवसांत ती आजारी पडून मरण पावली; तेव्हां त्यांनीं तिला धुऊन माडीवर खोलींत ठेविलें. ३८ लोद यापोजवळ होतें; तेथें पेत्र आहे असें शिष्यांनीं ऐकलें; म्हणून त्यांनीं दोघां जणांस पाठवून त्याला विनंति केली कीं आम्हांकडे येण्याला उशीर करूं नको. ३९ तेव्हां पेत्र उठून त्यांजबरोबर गेला. तो तेथें पोहंचतांच त्यांनीं त्याला माडीवर नेलें; त्याच्याजवळ सर्व विधवा रडत उभ्या राहिल्या, आणि

दुर्कस त्यांच्याजवळ असतां ती जे अंगरखे व जीं वस्त्रें
करीत असे तीं त्यांनीं त्याला दाखविलीं; ४० पण पेत्रानें
त्या सर्वांस बाहेर काढिलें, गुडघे टेकून प्रार्थना केली, व
कुडीकडे वळून म्हटलें, टबीथे, ऊठ. तेव्हां तिनें डोळे
उघडिले व पेत्राला पाहून ती उठून बसली. ४१ मग
त्यानें तिला हात देऊन उठविलें; आणि पवित्र जनांस व
विधवांस बोलावून त्यांच्यापुढें तिला जिवंत असें उभें
केलें. ४२ मग सर्व यापोमध्यें हें प्रसिद्ध झालें आणि
बहुतांनीं प्रभूवर विश्वास ठेविला. ४३ नंतर असें झालें कीं
तो यापोंत शिमोन नांवाच्या कोणाएका चांभाराच्या एथें
पुष्कळ दिवस राहिला.

### पेत्र व कर्नेल्य

१ कैसरीया येथें कर्नेल्य नामें कोणीएक पुरुष
१० इटलिक म्हटलेल्या पल्टणींत जमादार होता. २
तो धार्मिक व आपल्या सर्व कुटुंबासह देवाचें भय
बाळगणारा, लोकांस फार दानधर्म करणारा व देवाची
नित्य विनंति करणारा असा होता. ३ त्यानें दिवसाच्या
सुमारें तिसऱ्या प्रहरीं प्रत्यक्ष असा दृष्टांत पाहिला कीं
आपणाकडे देवाचा दूत येत असून कर्नेल्या, अशी हाक
मारीत आहे. ४ तेव्हां तो त्याजकडे लक्ष लावून भयभीत
होऊन म्हणाला, काय महाराज? त्यानें त्यांस म्हटलें, तुझ्या
प्रार्थना व तुझे दानधर्म हीं देवासमोर स्मरणार्थ आलीं आहेत.
५ तर आतां यापोस माणसें पाठीव आणि शिमोन पेत्र
नांवाच्या एका पुरुषाला बोलावून आण; ६ तो शिमोन
नांवाच्या कोणाएका चांभाराच्या एथें पाहुणा आहे; त्याचें
घर समुद्राच्या काठीं आहे. ७ जो देवदूत त्याच्याबरोबर
बोलत होता तो गेल्यानंतर त्यानें आपल्या घरच्या दोघां
चाकरांस व आपली एकनिष्ठेनें सेवा करणाऱ्यांतील एका
धार्मिक शिपायास बोलविलें; ८ आणि त्यांच्याजवळ सर्व
सविस्तर सांगून त्यांस यापोस पाठविलें.

९ ते दुसऱ्या दिवशीं वाटेवर असतां गांवाजवळ येत
आहेत तों दोन प्रहरच्या सुमारास पेत्र प्रार्थना करावयास
धाब्यावर गेला; १० तेव्हां त्याला भूक लागून कांहीं
खावेंसें वाटलें; आणि जेवणाची तयारी होत आहे इत-
क्यात त्याचें देहभान सुटलें. ११ तेव्हां आकाश उघडलेलें
व मोठ्या चांदव्यासारिखें चार कोपरे धरून सोडलेलें एक
पात्र पृथ्वीवर उतरत आहे असें तो पाहता झाला; १२
त्यांत पृथ्वीवरील सर्व चतुष्पाद प्राणी, सरपटणारे जंतु
व आकाशांतील पाखरें होतीं. १३ मग त्यास अशी वाणी
झाली कीं पेत्रा, ऊठ; मारून खा. १४ पेत्र म्हणाला,
नको, नको, प्रभु; असें कसें होईल? कारण निषिद्ध आणि
अशुद्ध असें मीं कधीं कांहीं खाल्लें नाहीं. १५ मग दुस-
ऱ्यानें त्यास वाणी झाली कीं देवानें जें शुद्ध केलें तें तूं
निषिद्ध मानूं नको. १६ असें तीन वेळां झालें आणि
लागलेंच तें पात्र आकाशांत वर घेतलें गेलें.

१७ आपण पाहिलेल्या दृष्टांत काय असावा याविषयीं
पेत्र विचारांत पडला असतां, पाहा, कर्नेल्यानें पाठविलेलीं
माणसें शिमोनाचें घर शोधून दरवाजाजवळ येऊन उभीं
राहिलीं; १८ आणि त्यांनीं हाक मारून विचारिलें, शिमोन
पेत्र एथें पाहुणा आहे काय? १९ पेत्र त्या दृष्टांताविषयीं
विचार करीत असतां आत्मा त्याला म्हणाला, पाहा, तीन
माणसें तुझा शोध करीत आहेत; २० तर उठून खालीं चल
आणि कांहीं कांक्षा न धरितां त्यांच्याबरोबर जा; कारण
मीं त्यांस पाठविलें आहे. २१ पेत्र त्या मनुष्यांकडे खालीं
येऊन म्हणाला, पाहा, ज्याचा तुम्ही शोध करितां तो मी
आहें; कोणत्या कारणास्तव तुमचें एथें येणें झालें? २२ ते
म्हणाले, कर्नेल्य जमादार हा धार्मिक मनुष्य असून देवाचें
भय बाळगणारा आहे आणि सर्व यहूदी लोक
त्याच्याविषयीं चांगली साक्ष देतात; त्याला पवित्र देवदूतानें
कळविलें आहे कीं आपणाला आपल्या घरीं बोलावून
आपणापासून दोन शब्द ऐकावे. २३ मग त्यानें त्यांस आंत
बोलावून त्यांचा पाहुणचार केला.

दुसऱ्या दिवशीं पेत्र त्यांच्याबरोबर निघाला, आणि
यापोंतील बंधुवर्गापैकीं कितीएक त्याच्याबरोबर गेले.
२४ दुसऱ्या दिवशीं ते कैसरीयास पोहंचले; तों कर्नेल्य
आपल्या नातलगांस व इष्टमित्रांस जमवून त्यांची वाट
पाहत होता. २५ पेत्र आंत जात असतां कर्नेल्यानें
त्याची भेट घेतली आणि त्याच्या पायां पडून नमस्कार
केला; २६ पण पेत्र त्याला उठवून म्हणाला, उभे
राहा; मीहि मनुष्यच आहें. २७ मग तो त्याच्या-

बरोबर बोलतबोलत आंत गेला, तेव्हां त्यानें पुष्कळ
लोकांना एकत्र जमलेलें पाहिलें. २८ त्यानें त्यांस म्हटलें,
यहूदी मनुष्यानें अन्य जातीच्या मनुष्याबरोबर संबंध
ठेवणें किंवा त्याच्याजवळ जाणें त्याला अशास्त्र आहे
हें तुम्हांला ठाऊक आहे; तथापि कोणाहि मनुष्याला
निषिद्ध किंवा अशुद्ध म्हणूं नये असें देवानें मला
दाखविलें आहे; २९ यास्तव मला बोलावणें आल्या-
मुळें मी कांकूं न करितां आलों. तर मी विचारतों,
तुम्हीं मला कशासाठीं बोलाविलें ? ३० तेव्हां कर्नेल्य
म्हणाला, आज चार दिवस झाले, मी आपल्या घरीं
तिसऱ्या प्रहरीं प्रार्थना करीत होतों; तेव्हां पाहा,
शुभ्र पोषाक घातलेला एक मनुष्य मजपुढें उभा
राहून म्हणाला, ३१ कर्नेल्या, तुझी प्रार्थना ऐकण्यांत
आली आहे, आणि तुझे दानधर्म देवाच्यासमोर
स्मरण्यांत आले आहेत; ३२ यास्तव याफोस कोणाला
पाठवून पेत्र म्हटलेला शिमोन याला बोलाव; तो
समुद्राच्या काठीं शिमोन चांभार याच्या घरीं पाहुणा
आहे; ३३ म्हणून मीं आपणाकडे माणसांना तत्काळ
पाठविलें; आपण आलां हें बरें केलें, तर आतां
प्रभूनें जें कांहीं आपणाला आज्ञापिलें आहे, तें ऐकावें
म्हणून आम्ही सर्व एथें देवासमोर आहों.

## पेत्राचें भाषण

३४ तेव्हां पेत्रानें बोलण्यास आरंभ करून म्हटलें:
३५ देव पक्षपाती नाहीं, हें मला पक्कें समजतें;
तर सर्व राष्ट्रांपैकीं जो त्याची भीति बाळगतो व
ज्याचीं कृत्यें धर्मशील आहेत तो त्याला मान्य आहे.
३६ येशू ख्रिस्त (जो सर्वांचा प्रभु आहे) त्याच्या
द्वारें देवानें शांतीची सुवार्ता गाजवितांना आपलें
वचन इस्राएलाच्या संततीस पाठविलें. ३७ योहानानें
जो बाप्तिस्मा गाजविला त्यानंतर गालीलापासून प्रारंभ
होऊन सर्व यहूदीयामध्यें घडलेली गोष्ट तुम्हांला माहीत
आहे. ३८ नासोरी येशूला देवानें पवित्र आत्म्याचा
व सामर्थ्याचा अभिषेक केला; तो सत्कर्मे करीत व
सैतानाच्या सत्तेखालीं असलेल्या सर्वांस बरें करीत
फिरत असे; कारण देव त्याच्याबरोबर होता; ३९
आणि त्यानें यहूद्यांच्या देशांत व यरुशलेमांत जें कांहीं
केलें त्या सर्वांचे साक्षी आम्ही आहों. त्यांनीं त्याला
खांबावर टांगून मारिलें; ४० त्याला देवानें तिसऱ्या
दिवशीं उठविलें, व त्यानें प्रकट व्हावें असें केलें.
४१ तरी हें प्रकटीकरण सर्व लोकांस नव्हे, पण जे
साक्षी देवानें पूर्वी निवडिले त्या आम्हांस केलें; त्या
आम्हीं तो मेलेल्यांतून उठल्यानंतर त्याच्याबरोबर
खाणेंपिणें केलें; ४२ त्यानें आम्हांस आज्ञा केली कीं
लोकांस उपदेश करा व साक्ष द्या कीं देवानें नेमलेला,
जीवंतांचा व मेलेल्यांचा असा न्यायाधीश, हाच आहे.
४३ त्याजविषयीं सर्व संदेष्टे साक्ष देतात कीं त्याजवर
विश्वास ठेवणाऱ्या प्रत्येकाला त्याच्या नामानें पापांपासून
मुक्ति मिळेल.

## विदेशी लोकांवर पवित्र आत्मा उतरतो व त्यांचा बाप्तिस्मा

४४ पेत्र हें बोलत असतां, वचन ऐकणाऱ्या सर्वांवर
पवित्र आत्मा आला. ४५ मग विदेशी लोकांस पवित्र
आत्म्याचें दान भरपूर मिळालें आहे असें पाहून,
पेत्राबरोबर आलेल्या विश्वास ठेवणाऱ्या सर्व सुंती लोकांना
आश्चर्य वाटलें; ४६ कारण त्यांनीं त्यांना अनेक भाषा
बोलतांना व देवाचें स्तवन करितांना ऐकलें. ४७ तेव्हां
पेत्रानें म्हटलें, ज्यांना आमच्यासारिखा पवित्र आत्मा
मिळाला आहे, त्यांचा बाप्तिस्मा करण्याकरितां कोणाच्यानें
पाणी मना करवेल काय ? ४८ मग येशू ख्रिस्ताच्या
नामांत त्यांचा बाप्तिस्मा व्हावा अशी त्यानें आज्ञा केली.
तेव्हां कांहीं दिवस राहावें म्हणून त्यांनीं त्याला विनंति
केली.

## पेत्र आपल्या कृतीचें समर्थन करतो

१ प्रेषितांनीं व यहूदीया प्रांतांत असलेल्या
११ बंधुजनांनीं असें ऐकलें कीं विदेशी लोकांनींहि
देवाचें वचन ग्रहण केलें. २ मग पेत्र यरुश-
लेमास गेला तेव्हां सुंती लोक त्याजबरोबर वाद
घालूं लागले कीं ३ बेसुंती माणसांकडे जाऊन त्यांच्या-
बरोबर तूं जेवलास. ४ तेव्हां पेत्रानें आरंभ करून
अनुक्रमानें सविस्तर सांगण्यास सुरुवात केली: ५ मी

यापो नगरांत प्रार्थना करीत होतों; तेव्हां देहभान
सुटून मीं असा एक दृष्टांत पाहिला कीं एक पात्र
उतरलें, तें मोठ्या चांदव्यासारखें चार कोपरे धरून
आकाशांतून सोडलेलें असें माझ्यापर्यंत आलें; ६
त्याकडे मीं न्याहाळून पाहून विचार करीत होतों तों
पृथ्वीवरले चतुष्पाद प्राणी, श्वापदें, सरपटणारे जंतु व
आकाशांतलीं पाखरें अशीं दृष्टीस पडलीं; ७ आणि
मीं अशी वाणीहि ऐकली कीं, पेत्रा, ऊठ; मारून
खा; ८ परंतु मी म्हणालों, नको, नको, प्रभू; कारण
निषिद्ध किंवा अशुद्ध असें कांहीं माझ्या तोंडांत
अजून कधीं गेलें नाहीं. ९ मग दुसऱ्यानें आका-
शांतून वाणी होऊन ती मला म्हणाली, देवानें जें
शुद्ध केलें तें तूं निषिद्ध मानूं नको. १० असें तीनदां
झालें; नंतर तीं अवघीं पुनः आकाशांत वर ओढलीं
गेलीं. ११ इतक्यांत पाहा, ज्या घरांत आम्ही होतों
त्यापुढें कैसरीयांतून मजकडे पाठविलेलीं तीन माणसें
उभीं राहिलीं. १२ तेव्हां आत्म्यानें मला सांगितलें
कीं कांहीं कांक्षा न बाळगितां त्यांच्याबरोबर जा. मग
हे सहा बंधुहि मजबरोबर आले, आणि आम्ही त्या
मनुष्याच्या घरांत गेलों. १३ त्यानें आम्हांला सांगितलें
कीं मीं आपल्या घरीं देवदूत उभा राहिलेला पाहिला.
तो म्हणाला कीं यापोस कोणाला पाठवून शिमोन
पेत्राला बोलावून आण; १४ ज्याच्या योगें तुझें व
तुझ्या सर्व कुटुंबाचें तारण होईल अशा गोष्टी तो
तुला सांगेल. १५ मी बोलूं लागलों तों, जसा आरंभीं
आपल्यावर तसा त्यांजवरहि पवित्र आत्मा आला. १६
तेव्हां प्रभूनें सांगितलेली गोष्ट मला आठवली, ती अशी
कीं योहान पाण्यानें बाप्तिस्मा करीत असे खरें; परंतु
तुमचा बाप्तिस्मा पवित्र आत्म्यानें होईल. १७ जेव्हां
आपण प्रभु येशू ख्रिस्तावर विश्वास ठेविला तेव्हां जसें
आपणांस तसें त्यांसहि देवानें सारखेंच दान दिलें; तर
मग देवाला अडविणारा असा मी कोण? १८ हें ऐकून ते
उगे राहिले, आणि देवाचें गौरव करीत बोलले, तर मग
देवानें विदेशी लोकांसहि जीवनप्राप्त्यर्थ पश्चात्तापबुद्धि
दिली आहे.

## विदेशीयांमधून झालेल्यांची अंत्युखियांतील ख्रिस्ती मंडळी

१९ स्तेफनावरून उद्भवलेल्या संकटामुळें जे पांगले
होते ते फेनीके, कुप्र व अंत्युखिया एथपर्यंत यहू-
दांस मात्र देवाचें वचन सांगत असत. २० तरी
त्यांजपैकीं कित्येक कुप्री व कुरेनेकर होते, त्यांनी
अंत्युखियांत येऊन प्रभु येशूची सुवार्ता हेल्लेणी लोकां-
सहि सांगितली. २१ तेव्हां प्रभूचा हात त्यांजबरोबर
होता, आणि पुष्कळ लोक विश्वास धरून प्रभूकडे वळले.
२२ त्यांजविषयींचें वर्तमान यरुशलेमांतल्या मंडळीच्या
कानीं आलें तेव्हां त्यांनीं बर्णबाला अंत्युखियापर्यंत
पाठविलें; २३ तो तेथें पोहंचल्यावर देवाची कृपा
पाहून हर्षित झाला; आणि त्यानें त्या सर्वांस बोध
केला कीं निश्चयपूर्ण चित्तानें प्रभूला बिलगून राहावें.
२४ तो चांगला मनुष्य होता, आणि पवित्र आत्म्यानें
व विश्वासानें पूर्ण होता; तेव्हां प्रभूच्या शिष्यमंडळांत
पुष्कळ जणांची भर पडली. २५ नंतर तो शौलाचा
शोध करावयाला तार्सास गेला; २६ त्याचा शोध
लागल्यावर त्यानें त्याला अंत्युखियास आणिलें. मग असें
झालें कीं त्यांनीं तेथें वर्षभर मंडळीमध्यें मिळून-
मिसळून बऱ्याच लोकांस शिकविलें; आणि शिष्यांस
ख्रिस्ती हें नांव पहिल्यानें अंत्युखियांत मिळालें.

## बर्णबा व शौल यांचें यरुशलेमास कामगिरीवर जाणें

२७ त्या दिवसांत यरुशलेमाहून अंत्युखियास संदेष्टे
आले. २८ तेव्हां त्यांच्यांतील अगब नामक मनुष्यानें
उठून आत्म्याच्या योगें सुचविलें कीं सर्व जगांत
मोठा दुष्काळ पडणार आहे. हा दुष्काळ क्लौद्याच्या
वेळेस झाला. २९ तेव्हां प्रत्येक शिष्यानें संकल्प
केला कीं यहूदीयांत राहणाऱ्या बंधुजनांच्या मदती-
करितां यथाशक्ति कांहीं पाठवून द्यावें; ३० त्याप्रमाणें
त्यांनीं केलें, म्हणजे तें बर्णबा व शौल यांच्या हातीं
वडीलवर्गाकडे पाठवून दिलें.

---

१ मुळांत : प्रेस्बुतरांकडे

## पेत्राची बंदिवासांतून सुटका होते

१२ १ त्या वेळेस हेरोद राजानें मंडळींतल्या
कित्येकांस छळावें म्हणून त्यांजवर हात टाकिला; २
आणि योहानाचा भाऊ याकोब याला त्यानें तरवारीनें
जिवें मारिलें. ३ तें यहूदी लोकांस आवडलें असें पाहून तो
पेत्रालाहि धरण्यास प्रवृत्त झाला. ते बेखमीर भाकरींचे
दिवस होते. ४ त्याला धरल्यावर त्यानें त्याला बंदिशाळेंत
ठेविलें, आणि त्याच्या रखवालीकरितां त्याला शिपायांच्या
चार चौकड्यांच्या स्वाधीन केलें; वल्हांडण सण झाल्यावर
त्याला लोकांपुढें बाहेर आणावें असा बेत त्यानें केला. ५
याप्रमाणें पेत्र बंदिशाळेंत पहाऱ्यांत होता; परंतु त्याजकरितां
देवाजवळ मंडळीची प्रार्थना एकाग्रतेनें चालली होती. ६
हेरोद त्याला बाहेर आणणार होता, त्या रात्रीं पेत्र दोन
बेड्या घातलेला असा दोघां शिपायांमध्यें निजला होता;
आणि पहारेकरी दरवाजापुढें बंदिशाळा राखीत होते.
७ तेव्हां पाहा, प्रभूचा दूत त्याच्याजवळ अवतीर्ण झाला,
आणि खोलींत उजेड पडला; त्यानें पेत्राच्या कुशीवर थाप
मारून त्याला जागें करून म्हटलें, लवकर ऊठ. तेव्हां
त्याच्या हातांतील बेड्या पडल्या. ८ मग देवदूतानें त्याला
सांगितलें, कमर बांध व वहाणा घाल; त्यानें तसें केलें. त्यानें
त्याला म्हटलें, तूं आपलें वस्त्र पांघरून माझ्यामागें ये. ९
तो निघून त्याच्यामागें चालूं लागला; तरी देवदूताच्या
द्वारा झालें तें खरें आहे असें त्याला कळलें नाहीं; आपण
दृष्टांत पाहत आहों असें त्याला वाटलें. १० नंतर पहिला
व दुसरा पहारा ओलांडून ते नगरांत जाण्याच्या लोखंडी
दरवाजापर्यंत आल्यावर, तो आपोआप त्यांच्यासाठीं
उघडला; आणि ते बाहेर पडून पुढें एक रस्ता चालून गेले,
तों देवदूत अंतर्धान पावला. ११ मग पेत्र शुद्धीवर येऊन
म्हणाला, आतां मला खरोखर कळलें कीं प्रभूनें आपला दूत
पाठवून मला हेरोदाच्या हातांतून व यहूद्यांच्या सर्व
प्रतीक्षेपासून सोडविलें आहे. १२ असें समजून मार्क
योहान याची आई मरीया इच्या घराजवळ तो आला; तों
तेथें बरेच लोक एकत्र मिळून प्रार्थना करीत होते. १३
तो दरवाजाची दिंडी ठोकीत असतां रुदा नांवाची मुलगी
जबाब देण्यास आली. १४ तिनें पेत्राचा शब्द ओळखिला,
पण हर्षामुळें दरवाजा न उघडतां, आंत धावत जाऊन
सांगितलें कीं पेत्र दरवाजापुढें उभा राहिला आहे. १५
त्यांनीं तिला म्हटलें, तूं चळलीस; तरी तिनें खातरीनें
सांगितलें कीं तसेंच आहे; ते म्हणाले, तो त्याचा देवदूत
असेल. १६ मग पेत्र ठोकीत राहिला असतां त्यांनीं
दरवाजा उघडला आणि त्याला पाहून ते थक्क झाले. १७
तेव्हां उगे राहा, म्हणून त्यानें हातानें त्यांस खुणाविलें;
आपणाला प्रभूनें बंदिशाळेंतून कसें काढिलें हें त्यानें त्यांस
सविस्तर सांगितलें, आणि म्हटलें कीं हें याकोबास व
बंधुवर्गास सांगा. नंतर तो दुसऱ्या ठिकाणीं निघून गेला.
१८ मग दिवस उगवल्यावर, पेत्राचें काय झालें, अशी
शिपायांत मोठी गडबड उडाली. १९ हेरोदानें त्याचा शोध
केला असतांहि शोध लागला नाहीं, म्हणून त्यानें पहारेकऱ्यांची
चौकशी करून त्यांस ठार मारावें अशी आज्ञा दिली. मग
तो यहूदीयाहून कैसरीयांत येऊन राहिला.

## हेरोदाचा मृत्यु

२० हेरोद सोरकरांवर व सीदोनकरांवर रागावला होता,
म्हणून त्यांनीं एकमतानें त्याजकडे येऊन राजाच्या
रंगमहालावरील अधिकारी ब्लस्त याला अनुकूल करून
घेऊन सल्ला करण्याची विनंति केली, कारण त्या राजाच्या
देशावर त्यांच्या देशाचें पोषण होत असे. २१ नंतर
नेमिलेल्या दिवशीं हेरोद राजकीय पोषाख करून आसनावर
बसला आणि जमलेल्या लोकांबरोबर भाषण करूं लागला.
२२ तेव्हां लोक गजर करून बोलले, ही देववाणी आहे,
मनुष्यवाणी नव्हे. २३ त्यानें देवाला मान दिला नाहीं;
म्हणून तत्क्षणीं प्रभूच्या दूतानें त्याजवर प्रहार केला आणि
तो किडे पडून मेला.
२४ देवाच्या वचनाची वृद्धि व प्रसार होत गेला.
२५ बर्णबा व शौल हे आपली सेवा पूर्ण करून मार्क
योहानाला बरोबर घेऊन यरुशलेमाहून माघारे आले.

## अंत्युखियांतील ख्रिस्ती मंडळी

१३ १ अंत्युखियांतल्या मंडळींत बर्णबा, शिमोन
निग्र, लूक्य कुरेनेकर, [illegible] मांडलिक
हेरोद राजाच्याबरोबर [illegible] होते तो [illegible]
व शौल हे संदेष्टे व शिक्षक होते. २ ते प्रभूची सेवा व

उपास करीत असतां पवित्र आत्म्यानें सांगितलें कीं बर्णबा व शौल यांस ज्या कार्यासाठीं मीं बोलाविलें आहे त्यासाठीं त्यांस मजकरितां निराळें करून ठेवा. ३ त्यांनीं उपास व प्रार्थना करून आणि त्यांजवर हात ठेवून त्यांची रवानगी केली.

### कुप्र येथें बर्णबा व शौल

४ याप्रमाणें पवित्र आत्म्याच्या द्वारें त्यांची रवानगी झाल्यावर ते सलूकीयांत येऊन तारवांतून कुप्रास गेले. ५ मग ते सलमीनांत असतां त्यांनीं देवाचें वचन यहूद्यांच्या सभास्थानांमध्यें गाजविलें; आणि योहान हाहि त्यांचा सेवक होता. ६ पुढें ते सर्व बेटांतून चालून पफेस गेल्यावर बर्येशू नांवाचा कोणीएक यहूदी जादूगीर व खोटा संदेष्टा त्यांस आढळला. ७ तो तेथील अधिकारी सिर्ग्य पौल नांवाच्या बुद्धिमान् मनुष्याजवळ होता; या अधिकाऱ्यानें बर्णबा व शौल यांस बोलावून देवाचें वचन ऐकण्याची उत्कंठा दर्शविली; ८ परंतु अलीम जादूगीर ( याच्या नांवाचा हाच अर्थ आहे, ) यानें त्यांस अडवून अधिकाऱ्याला विश्वासापासून फितवावयाचा प्रयत्न केला. ९ तेव्हां शौल, ज्यास पौलहि म्हणत तो, पवित्र आत्म्यानें पूर्ण होत्साता त्याजकडे दृष्टि लावून म्हणाला, १० अरे सर्व कपटानें व सर्व लुच्चेगिरीनें भरलेल्या सैतानाच्या पुत्रा, अवघ्या धार्मिकतेच्या वैऱ्या, तूं प्रभूचे सरळ मार्ग विपरीत करण्याचें सोडून देणार नाहींस काय? ११ तर पाहा, आतां प्रभूचा हात तुला प्रतिकूल आहे, तूं अंधळा होशील, व कांहीं वेळपर्यंत सूर्य तुला दिसणार नाहीं. तत्क्षणींच धुकें व अंधार त्याजवर पडला; तेव्हां आपणाला हातीं धरून न्यावें म्हणून तो इकडे तिकडे कोणा मनुष्याचा शोध करूं लागला. १२ तेव्हां जें झालें तें पाहून त्या अधिकाऱ्यानें प्रभूच्या शिक्षणावरून आश्चर्य मानून विश्वास धरिला.

### पिसिदियांतील अंत्युखियामध्यें पौलानें यहूद्यांस केलेला धर्मोपदेश

१३ मग पौल व त्याच्या सोबतीचे लोक पफेहून तारवांतून पंफुल्यांतील पिर्गा एथें गेले, आणि योहान त्यांस सोडून यरुशलेमास माघारा गेला. १४ नंतर ते पिर्गा एथून निघून फिरतफिरत पिसिदियांतील अंत्युखियास पोहंचले; आणि शब्बाथ दिवशीं सभास्थानांत जाऊन बसले. १५ तेव्हां नियमशास्त्र व संदेष्टे यांचें वाचन झाल्यावर सभास्थानाच्या अधिकाऱ्यांनीं त्यांस सांगून पाठविलें कीं बंधुजनहो, तुम्हांजवळ लोकांकरितां कांहीं बोधवचन असलें तर सांगा. १६ तेव्हां पौल उभा राहून हातानें खुणावून म्हणाला:

अहो इस्राएल लोकांनो, व देवाचें भय बाळगणाऱ्यांनो, ऐका. १७ या इस्राएल लोकांच्या देवानें आपल्या पूर्वजांस निवडून घेतलें, ते लोक मिसर देशांत प्रवासी असतां त्यांचा उत्कर्ष केला आणि पराक्रमी भुजानें त्यांस तेथून काढिलें. १८ पुढें सुमारें चाळीस वर्षेपर्यंत त्यानें त्यांची वर्तणूक रानांत सहन केली. १९ नंतर त्यानें कनान देशांतील सात राज्यें बुडवून तेथील भूमि त्यांस सुमारें साडेचारशें वर्षेपर्यंत वतन अशी दिली. २० त्यानंतर त्यानें शमुवेल संदेष्ट्यापर्यंत त्यांस न्यायाधीश नेमून दिले. २१ मग त्यांनीं राजा मागितला; तेव्हां देवानें बन्यामीन वंशांतील किशाचा पुत्र शौल ह्यास चाळीस वर्षेपर्यंत त्यांस दिलें. २२ नंतर त्यानें त्याला दूर करून त्यांचा राजा होण्यासाठीं दाविदास उभें केलें, आणि त्याजविषयीं प्रतिज्ञेनें म्हटलें कीं माझ्या मनासारिखा इशायाचा पुत्र दावीद मला मिळाला आहे, तो माझ्या सर्व इच्छा सिद्धीस नेईल. २३ ह्या मनुष्याच्या वंशजांत देवानें वचनानुरूप इस्राएलासाठीं तारणारा येशू ह्यास आणिलें; २४ त्याच्या प्रगट होण्याच्या पूर्वी योहानानें पुढें येऊन पश्चात्तापाचा बाप्तिस्मा सर्व इस्राएल लोकांमध्यें गाजविला होता. २५ योहान आपला कार्यक्रम पूर्ण करीत असतां म्हणाला, मी कोण आहें म्हणून तुम्हांस वाटतें? मी तो नव्हें, तर पाहा, ज्याच्या पायांतील वहाणा सोडावयास मी योग्य नाहीं असा कोणी माझ्या मागून येत आहे. २६ अहो बंधुजनहो, अब्राहामाच्या वंशांतील पुत्रांनो, व तुम्हांपैकीं देवाचें भय बाळगणाऱ्यांनो, आपल्याला या तारणाची वार्ता पाठविलेली आहे. २७ कारण यरुशलेमवासीयांनीं व त्यांच्या अधिकाऱ्यांनीं त्याला न ओळखून आणि दर शब्बाथ दिवशीं वाचण्यांत येणारे

संदेष्ट्यांचे शब्दहि न समजून, त्याला दोषी ठरविल्यानें
ते पूर्ण केले; २८ आणि मरणदंडाचें कोणतेंहि कारण
सांपडलें नसतां त्याचा वध करावा अशी त्यांनीं पिलातास
विनंति केली. २९ मग त्याविषयीं लिहिलेलें सर्व पूर्ण
करून त्यांनीं त्याला खांबावरून खालीं उतरवून कबरेमध्यें
ठेविलें. ३० देवानें त्याला मेलेल्यांमधून उठविलें; ३१
त्याच्याबरोबर जे गालीलपासून यरुशलेमांत आले होते
त्यांच्या दृष्टीस तो पुष्कळ दिवस पडत असे; ते आतां
लोकांस त्याचे साक्षी आहेत. ३२ आपल्या पूर्वजांस जें
वचन दिलें होतें त्याची सुवार्ता आम्ही तुम्हांस सांगतों:
३३ देवानें येशूला पुन: उठवून तें वचन आपल्या मुलां-
बाळांकरितां पूर्ण केलें आहे; दुसऱ्या स्तोत्रांतहि असें
लिहिलें आहे, ‘तूं माझा पुत्र आहेस; आज मीं तुला
जन्म दिला आहे.’ ३४ शिवाय, त्यानें कुजण्याच्या
अवस्थेपर्यंत परत जाऊं नये म्हणून त्यानें त्याला
मेलेल्यांतून उठविलें; याविषयीं त्यानें म्हटलें आहे कीं
‘दाविदाचें जें पवित्र व विश्वसनीय दान तें तुम्हांला
देईन.’ ३५ यास्तव आणखी एका स्तोत्रांत तो
म्हणतो, ‘तूं आपल्या पवित्र पुरुषाला कुजूं देणार
नाहींस.’ ३६ दाविदानें आपल्या पिढींत देवाच्या
इच्छेप्रमाणें सेवा करून महानिद्रा घेतली, आणि पूर्वजां-
बरोबर तो मिळून कुजून गेला; ३७ परंतु ज्याला
देवानें उठविलें तो कुजला नाहीं; ३८ यास्तव बंधु-
जनहो, तुम्हांस हें ठाऊक असो कीं याच्याद्वारें पापांची
क्षमा तुम्हांस गाजवून सांगितली आहे; ३९ आणि
ज्याविषयीं मोशाच्या नियमशास्त्रानें तुम्ही न्यायी ठरत
नाहीं त्या सर्वांविषयीं याजकडून प्रत्येक विश्वास ठेवणारा
न्यायी ठरतो, ४० यास्तव सावध राहा, नाहीं तर
संदेष्ट्यांच्या ग्रंथांत जें सांगितलेलें आहे तें तुम्हांवर
येईल:

४१ पाहा, अहो धिक्कार करणाऱ्यांनो,
पाहून आश्चर्य माना, व नाहींतसे व्हा;
कारण तुमच्या काळांत मी एक कार्य करितों,
तें कार्य असें कीं त्याविषयीं तुम्हांला कोणीं सविस्तर
सांगितलें तरी तुम्ही विश्वास धरणारच नाहीं.

४२ ते बाहेर जातांना लोकांनीं विनंति केली
कीं आम्हांस पुढल्या शब्बाथवारीं या गोष्टी सांगाव्या,
४३ आणि सभा उठल्यावर, यहूद्यांतील व भक्तिमान्
यहूदी मतानुसारी यांच्यांतील पुष्कळ जन पौल व
बर्णबा यांच्यामागें गेले; त्यांनीं त्यांजबरोबर बोलून
देवाच्या कृपेंत टिकून राहण्यास त्यांचें मन वळविलें.

### प्रेषित विदेशीयांकडे वळतात

४४ पुढल्या शब्बाथवारीं बहुतेक सर्व नगर देवाचें
वचन ऐकावयाला जमलें. ४५ लोकसमुदायांस पाहून
यहूदी लोकांस हेव्यामुळें वेष आला आणि पौल जें
बोलला त्याचा विरोध करून ते अपशब्द बोलूं लागले.
४६ तेव्हां पौल व बर्णबा हे निर्भीडपणें बोलले:
देवाचें वचन तुम्हांस प्रथम सांगावयाचें अगत्य होतें,
तरी ज्या अर्थी तुम्ही त्याचा अव्हेर करितां व आप-
णांस सार्वकालिक जीवनाकरितां अयोग्य ठरवितां त्या
अर्थी पाहा, आम्ही विदेशी लोकांकडे वळतों. ४७
कारण प्रभूनें आम्हांस आज्ञा दिली आहे, ती ही कीं

मीं तुला राष्ट्रांचा प्रकाश असें ठेविलें आहे,
यासाठीं कीं पृथ्वीच्या दिगंतापर्यंत तूं तारण असें
व्हावें.

४८ हें ऐकून विदेशी लोक हर्षयुक्त झाले, आणि
त्यांनीं देवाच्या वचनाचा महिमा वर्णिला; तेव्हां जितके
सार्वकालिक जीवनासाठीं नेमलेले होते तितक्यांनीं विश्वास
धरिला. ४९ प्रभूचें वचन त्या सर्व प्रांतांत पसरत
गेलें. ५० तेव्हां यहूदी लोकांनीं भक्तिमान् व कुलीन
स्त्रियांस व नगरांतील मुख्य पुरुषांस चिथाविलें आणि
पौल व बर्णबा यांचा छळ करून त्यांस आपल्या
प्रांतांतून घालविलें. ५१ त्यामुळें ते आपल्या पायांची
धूळ त्यांजवर झटकून इकुन्यास गेले. ५२ इकडे
शिष्यमंडळ आनंदानें व पवित्र आत्म्यानें पूर्ण झालें.

### इकुन्यामध्यें पौल व बर्णबा

१४ १ मग इकुन्यांत असें झालें कीं यहूदी
लोकांच्या सभास्थानांत ते एकत्र मिळून गेले
आणि अशा रीतीनें बोलले कीं यहूदी व हेल्लेणी

यांच्या मोठ्या जमावानें विश्वास धरिला; २ परंतु जे
यहूदी विरोधी होते त्यांनीं विदेशी लोकांचें मन बंधु-
वर्गाविरुद्ध चेतवून दूषित केलें. ३ ते बरेच दिवस
तेथें राहिले व प्रभुविषयीं निर्भीडपणें बोलले; त्यानेंहि
आपल्या कृपेच्या वचनाबद्दल साक्ष दिली; म्हणजे
त्यांच्या हातांनीं चिन्हें व अद्भुतें होऊं दिलीं. ४ तेव्हां
नगरांतील लोकसमुदायांत फूट पडली; कित्येकांनीं
यहूद्यांची व कित्येकांनीं प्रेषितांची बाजू धरली. ५ मग
त्यांचा उपमर्द करून त्यांना दगडमार करण्याकरितां
विदेशी व यहूदी आपल्या अधिकाऱ्यांसुद्धां त्यांजवर
धावले. ६ हें पाहून ते लुकवनिया प्रांतांतील लुस्त्र व
दर्बे या नगरांत व त्यासभोंवतालच्या प्रदेशांत पळून
गेले; ७ आणि तेथें ते सुवार्ता सांगत राहिले.

### लुस्त्र येथें पौल व बर्णबा

८ तेव्हां लुस्त्रांत कोणीएक माणूस पायांनीं अधू
असा बसला होता, तो जन्मतः पांगळा असून कधीं
चालला नव्हता. ९ त्यानें पौलाचें बोलणें ऐकलें; त्यानें
त्याजकडे दृष्टि लावून व त्याला बरें होण्याचा विश्वास
आहे असें पाहून, १० मोठ्यानें म्हटलें, तूं आपल्या
पायांवर नीट उभा राहा. तेव्हां तो उडी मारून
उठला आणि चालूं लागला. ११ पौलानें केलेलें कृत्य
पाहून लोकसमुदाय लुकवनी भाषेंत मोठ्यानें ओरडून
बोलले, देव मनुष्यांच्या रूपानें आम्हांकडे उतरले
आहेत; १२ त्यांनीं बर्णबाला ज्युपितर म्हटलें; व पौल
मुख्य वक्ता होता म्हणून त्याला मर्क्युरी म्हटलें.
१३ मग नगरापुढें असलेल्या ज्युपितराच्या पुजाऱ्यानें
बैल व माळा दरवाजांजवळ आणिल्या, आणि लोकां-
बरोबर तो यज्ञ करणार होता. १४ हें ऐकून प्रेषितांनीं
म्हणजे बर्णबा व पौल यांनीं आपलीं वस्त्रें फाडिलीं
आणि लोकांमध्यें शिरून उच्च वाणीनें म्हटलें, १५
गृहस्थांनो, हें कां करितां? आम्ही व तुम्ही सम-
भावनेचीं मनुष्यें आहों; तुम्हीं या निरर्थक गोष्टी सोडून
ज्यानें आकाश, पृथ्वी, समुद्र व त्यांतील अवघें
उत्पन्न केलें त्या जिवंत देवाकडे वळावें अशी सुवार्ता
आम्ही तुम्हांस सांगतों. १६ त्यानें गतकाळांतील पिढ्यां-
मध्यें सर्व राष्ट्रांस त्यांच्या त्यांच्या मार्गांनीं चालूं
दिलें; १७ तथापि त्यानें स्वतःस साक्षीविरहित राहूं
दिलें नाहीं; म्हणजे त्यानें उपकार केले, आकाशा-
पासून पर्जन्य व फलदायक ऋतु तुम्हांस दिले, आणि
अन्नानें व हर्षानें तुम्हांस मन भरून तृप्त केलें. १८
असें बोलून त्यांनीं आपणांला यज्ञ करण्यापासून लोकांस
मोठ्या मुष्किलीनें आवरलें.

१९ नंतर अंत्युखिया व इकुन्या एथून कित्येक
यहूदी आले; त्यांनीं लोकांचें मन वळवून पौलाला
दगडमार केला, आणि तो मेला असें समजून त्याला
नगराबाहेर ओढून टाकिलें; २० पण शिष्य त्याच्या-
सभोंवते जमल्यावर तो उठला व निघून नगरांत आला;
मग दुसऱ्या दिवशीं बर्णबाबरोबर तो दर्बेस गेला.

### ते अंत्युखियास परत जातात

२१ त्या नगरांत त्यांनीं सुवार्ता सांगून पुष्कळ शिष्य
केल्यावर लुस्त्र, इकुन्या व अंत्युखिया या नगरांत ते परत
आले; २२ आणि शिष्यांचीं चित्तें स्थिरावून त्यांस बोध
केला कीं विश्वासांत टिकून राहावें; कारण आपणांला
पुष्कळ संकटांतून देवाच्या राज्यांत जावें लागतें. २३
त्यांनीं त्यांजसाठीं प्रत्येक मंडळींत वडीलमंडळ निवडलें;
आणि उपास व प्रार्थना करून, ज्या प्रभूवर त्यांनीं विश्वास
ठेविला होता त्याजकडे त्यांस निरविलें. २४ मग ते
पिसिदियामधून पंफुल्यांत गेले; २५ आणि पिर्गा एथें
वचन सांगितल्यावर ते अत्तलियास उतरले. २६ तेथून
ते अंत्युखियास येण्यास तारवांत बसून निघाले; जें
कार्य त्यांनीं साधिलें त्याकरितां त्यांना देवाच्या कृपेवर
निरविल्यावर ते तेथूनच निघाले होते. २७ तेथें
पोहंचल्यावर त्यांनीं मंडळी मिळवून, आपण देवाच्या
सहवासांत असतांना त्यानें काय काय केलें आणि विदेशी
लोकांकरितां विश्वासाचें दार कसकसें उघडिलें हें सांगितलें.
२८ मग ते शिष्यांच्याबरोबर बराच काळ राहिले.

### विदेशीयांतले ख्रिस्ती व मोशाचें नियमशास्त्र

१५ १ तेव्हां कित्येकांनीं यहूदीयाहून उतरून बंधु-
वर्गास अशी शिकवण दिली कीं मोशाच्या परि-
पाठाप्रमाणें सुंता झाल्यावांचून तुमचें तारण होणें

शक्य नाहीं. २ तेव्हां पौल व बर्णबा यांचा त्यांच्या-
बरोबर बराच मतभेद व वादविवाद झाल्यावर, असें
ठरविण्यांत आलें कीं पौल व बर्णबा यांनीं व त्यांच्यांतून
इतर कित्येकांनीं या वादासंबंधानें यरुशलेमांतले प्रेषित
व वडीलवर्ग यांजकडे जावें. ३ मग मंडळीनें त्यांस
बोळविल्यावर ते फेनीके व शोमरोन यांमधून गेले,
आणि विदेशी लोक देवाकडे वळल्याचें सविस्तर वर्तमान
सांगून त्यांनीं सर्व बंधुजनांना फार आनंदित केलें. ४
नंतर ते यरुशलेमास पोहंचल्यावर तेथील मंडळी, प्रेषित
व वडीलवर्ग यांनीं त्यांचा सत्कार केला; तेव्हां आपण
देवाच्या समागमांत असतांना त्यानें जें जें घडविलें तें
त्यांनीं सांगितलें; ५ परंतु परूशी लोकांच्या पंथांतील
कित्येक विश्वास धरणारे पुढें होऊन म्हणाले, त्यांची सुंता
झाली पाहिजे व मोशाचें नियमशास्त्र पाळावयास त्यांस
आज्ञा केली पाहिजे.

## यरुशलेम येथील धर्मसभा

६ मग प्रेषित व वडीलवर्ग या गोष्टींविषयीं विचार
करावयाला जमले. ७ तेव्हां पुष्कळ वादविवाद झाल्यावर,
पेत्र उभा राहून त्यांस म्हणाला:

बंधुजनहो, तुम्हांस ठाऊक आहे कीं माझ्या मुखानें
विदेशी लोकांनीं सुवार्ता ऐकून विश्वास धरावा म्हणून
आरंभींच्या दिवसांपासून तुम्हांमध्यें देवानें निवड केली;
८ आणि अंतरसाक्षी देवानें जसा आपणांस तसा त्यांसहि
पवित्र आत्मा देऊन त्याजविषयीं साक्ष दिली. ९ त्यांचीं
अंत:करणें विश्वासानें शुद्ध करून त्यानें त्यांच्या व आपल्या-
मध्यें कांहीं भेद ठेविला नाहीं. १० असें असतां जें जूं
आपले पूर्वज व आपणहि वाहावयास समर्थ नव्हतों तें
शिष्यांच्या मानेवर घालून तुम्ही देवाची परीक्षा कां
पाहतां? ११ तर मग जसें त्यांचें तसें आपलेंहि प्रभु
येशूच्या कृपेनें तारण होईल, असा आपला विश्वास आहे.

१२ तेव्हां सर्व लोक गप्प राहिले, आणि बर्णबा
व पौल ह्यांनीं आपल्या द्वारें विदेशी लोकांमध्यें देवानें
जीं जीं चिन्हें व अद्भुतें केलीं ह्यांचें केलेलें वर्णन त्यांनीं
ऐकून घेतलें. १३ मग त्यांचें भाषण संपल्यानंतर याकोब
म्हणाला:

बंधुजनहो, माझें ऐका. १४ विदेशी लोकांतून आपल्या
नामाकरितां लोक काढून घ्यावे म्हणून देवानें त्यांची भेट
कशी घेतली, हें शिमोनानें सांगितलें आहे; १५ आणि
त्याबरोबर संदेष्ट्यांच्या उक्तीचाहि मेळ बसतो; असें
लिहिलें आहे कीं,

१६ यानंतर मी पुनः येईन,
व दाविदाचा पडलेला डेरा पुनः उभारीन;
व त्याची मोडतोड पुनः उभारून नीट करीन;
१७ यासाठीं कीं शेष राहिलेल्या मनुष्यांनीं,
व ज्या राष्ट्रांला माझें नाम दिलें आहे त्या सर्वांनीं
प्रभूचा शोध करावा;
१८ हें जें त्याला युगादिपासून माहीत आहे तें करणारा
प्रभु असें म्हणतो.

१९ यास्तव माझें मत असें आहे कीं जे विदेश्यांतून
देवाकडे वळतात त्यांस त्रास देऊं नये; २० तर त्यांस
असें लिहून पाठवावें कीं मूर्तींचें अमंगळपण, जारकर्म, गुद-
मरून मेलेले प्राणी व रक्त यांपासून तुम्हीं दूर राहावें. २१
कारण प्राचीन काळापासून शब्बाथ दिवशीं सभास्थानांत
मोशाचें पुस्तक वाचून त्याची प्रसिद्धि करणारे लोक प्रत्येक
नगरांत आहेत.

## विदेशीयांतील ख्रिस्ती लोकांना एक पत्र

२२ तेव्हां सर्व मंडळीसह प्रेषितांस व वडिलांस हें
बरें वाटलें कीं पौल व बर्णबा यांच्याबरोबर आपणांतून
निवडलेलीं माणसें, म्हणजे बंधुवर्गातील प्रमुख बर्शब्बा
म्हटलेला यहूदा व सीला यांस अंत्युखियास पाठवावें;
२३ त्यांच्याबरोबर त्यांनीं असें लिहून पाठविलें: अंत्यु-
खिया, सूरिया व किलिकिया येथील विदेश्यांतले बंधुजन
यांस प्रेषित व वडीलवर्ग या बंधुवर्गाचा सलाम; २४
आमच्यापैकीं कित्येकांनीं जाऊन आपल्या बोलण्यानें तुम्हांस
घोटाळ्यांत पाडून त्रास दिला असें आमच्या कानीं आलें
आहे; पण त्यांस आम्हीं अशी आज्ञा दिली नव्हती. २५
यास्तव आमचें एकमत झाल्यावर आम्हांस हें योग्य दिसलें
कीं, २६ आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या नामाकरितां जीवांवर
उदार झालेले असे जे आपले प्रिय बंधु बर्णबा व पौल
यांच्याबरोबर तुम्हांकडे कांहीं माणसांना निवडून पाठवावें.

२७ ह्याकरितां यहूदा व सीला यांस आम्हीं पाठविलें आहे,
तेहि याच गोष्टी तुम्हांला तोंडोतोंड सांगतील. २८ पुढील
अगत्याच्या गोष्टींशिवाय तुम्हांवर जास्त भार घालूं नये असें
पवित्र आत्म्याला व आम्हांला योग्य दिसलें; २९ म्हणजे
मूर्तीला अर्पिलेले पदार्थ, रक्त, गुदमरून मेलेले प्राणी व
जारकर्म हीं तुम्ही वर्ज करावीं; ह्यांपासून आपणांस संभाळाल
तर तुमचें बरें होईल; कल्याण असो.

३० त्यांची रवानगी झाल्यावर ते अंत्युखियास गेले
आणि त्यांनीं सर्व मंडळीला जमवून तें पत्र सादर केलें.
३१ तें वाचून त्यांतल्या बोधापासून त्यांस आनंद झाला.
३२ यहूदा व सीला हे संदेष्टे होते, म्हणून त्यांनीहि पुष्कळ
बोलून बंधुजनांस बोध केला व स्थिराविलें. ३३ ते कांहीं
दिवस तेथें राहिल्यावर ज्यांनीं त्यांस पाठविलें होतें त्यांज-
कडे जाण्यास बंधुजनांनीं त्यांची शांतीनें रवानगी केली;
[ ३४ परंतु सीलाला तेथें आणखी राहावयाला बरें वाटलें. ]
३५ आणि पौल व बर्णबा इतर पुष्कळ जणांबरोबर प्रभूचें
वचन शिकवीत व सुवार्ता गाजवीत अंत्युखियास राहिले.

### पौल व बर्णबा वेगवेगळे होतात

३६ मग कांहीं दिवसांनंतर पौलानें बर्णबाला म्हटलें,
ज्या ज्या नगरांत आपण प्रभूचें वचन गाजविलें तेथें पुनः
जाऊन बंधुजनांस भेटून ते कसे आहेत हें पाहूं. ३७
बर्णबाची इच्छा होती कीं मार्क म्हटलेला योहान याला
बरोबर घ्यावें; ३८ परंतु पौलाला वाटलें कीं पंफुल्याहून जो
आपणाला सोडून गेला व आपल्या बरोबरीनें कामावर आला
नाहीं त्याला सोबतीस घेणें योग्य नाहीं. ३९ यावरून ते
संतप्त होऊन एकमेकांपासून वेगळे झाले, आणि बर्णबा
मार्काला घेऊन तारवांत बसून कुप्रास गेला; ४० पौलानें
सीलाला निवडून घेतलें आणि बंधुजनांनीं त्याला प्रभूच्या
कृपेवर निरवल्यावर तो तेथून निघाला. ४१ पुढें मंडळ्यांस
स्थिरावीत सूरिया व किलिकिया यांमधून तो गेला.

### लुस्त्र येथें तीमथ्य पौलास जाऊन मिळतो

१६ १ मग तो दर्बे व लुस्त्र एथेंहि आला; आणि
पाहा, तेथें तीमथ्य नामें कोणी शिष्य होता; तो
विश्वास ठेवणाऱ्या कोणाएका यहूदिणीचा पुत्र होता;
त्याचा बाप हेल्लेणी होता. २ तो लुस्त्रांतल्या व इकुन्यांतल्या
बंधुवर्गाकडून नांवाजलेला होता. ३ त्यानें आपणाबरोबर
यावें अशी पौलाची इच्छा होती; तेव्हां या ठिकाणीं जे
यहूदी होते त्यांजमुळें त्यानें त्याला घेऊन त्याची सुंता
केली कारण कीं त्याचा बाप हेल्लेणी आहे हें सर्वांस ठाऊक
होतें. ४ तेव्हां त्यांनीं नगरांमधून जातां जातां यरुशलेमां-
तील प्रेषित व वडीलवर्ग ह्यांनीं जे नियम ठरविले होते ते
त्यांस पाळावयाला नेमून दिले. ५ यावरून मंडळ्या विश्वा-
सांत स्थिर झाल्या व दिवसेंदिवस त्यांची संख्या वाढत
चालली.

### आसिया मायनरमधून पौलाचा प्रवास

६ नंतर आसिया देशांत वचन सांगण्यास त्यांस पवित्र
आत्म्याकडून अडथळा झाल्यामुळें ते फ्रुगिया व गलतिया
ह्या प्रांतांमधून गेले; ७ आणि मुसियापर्यंत आल्यावर
बिथुनियास जाण्याचा त्यांनीं प्रयत्न केला; परंतु येशूच्या
आत्म्यानें त्यांस जाऊं दिलें नाहीं; ८ मग ते मुसियाजवळून
जाऊन त्रोवसास खालीं गेले. ९ तेथें रात्रीं पौलाला असा
दृष्टांत झाला: कोणी मासेदोनियाचा माणूस उभा राहून
आपणाला विनंति करून म्हणत आहे कीं, इकडे मासेदोनि-
यांत येऊन आम्हांला साहाय्य कर. १० असा दृष्टांत त्याला
झाल्यानंतर त्या लोकांस सुवार्ता सांगावयाला देवानें आप-
ल्याला बोलाविलें आहे असें अनुमान करून आम्हीं मासेदो-
नियांत जाण्याचा लागलाच विचार केला.

### पौल मासेदोनियामधील फिलिप्पैला जातो

११ तेव्हां त्रोवसापासून हाकारून आम्ही नीट वाटेनें
समथ्राकेस गेलों, व दुसऱ्या दिवशीं नियापुलीस गेलों; १२
तेथून फिलिप्पैस गेलों, तें मासेदोनियाचें त्या भागांतलें
पहिलें नगर असून तेथें रोमी लोकांची वसाहत आहे; त्या
नगरांत आम्ही कांहीं दिवस राहिलों. १३ मग शब्बाथ
दिवशीं आम्ही वेशीबाहेरील नदीकाठीं, जेथें प्रार्थना होत
असते असें आम्हांस वाटलें तेथें, जाऊन बसलों; आणि
ज्या स्त्रिया तेथें जमल्या होत्या त्यांच्याबरोबर बोलूं लागलों.
१४ तेव्हां थुवतीरा नगरची लुदिया नांवाची कोणीएक स्त्री
जांभळीं वस्त्रें विकणारी देवभक्तीण होती; तिनें आमचें
भाषण ऐकलें; तिचें अंतःकरण प्रभूनें असें प्रफुल्लित केलें
कीं पौलाच्या सांगण्याकडे तिनें लक्ष दिलें. १५ मग तिचा

व तिच्या कुटुंबाचा बाप्तिस्मा झाल्यावर तिनें अशी विनंति
केली कीं मी प्रभूवर विश्वास ठेवणारी आहें असें जर तुम्हीं
ठरविलें आहे तर माझ्या घरीं येऊन राहा. ही विनंति तिनें
आग्रहानें आम्हांकडून मान्य करविली.

१६ मग असें झालें कीं आम्ही प्रार्थनास्थळाकडे जात
असतां दैवज्ञवारें अंगांत असलेली कोणीएक मुलगी
आम्हांस आढळली; ती दैवप्रश्न सांगून आपल्या धन्यास
पुष्कळ मिळकत करून देत असे. १७ ती पौलाच्या व
आमच्या मागें येऊन मोठ्यानें बोलली, हीं माणसें परात्पर
देवाचे दास आहेत; हे तुम्हांला तारणाचा मार्ग कळवितात.
१८ असें ती पुष्कळ दिवस करीत असे. मग पौल फार
अस्वस्थ होऊन मागें फिरून त्या पिशाचाला म्हणाला,
येशू ख्रिस्ताच्या नामानें मी तुला आज्ञा करितों कीं तूं
हिच्यामधून निघून जा; आणि तें तत्काळ निघून गेलें.

## पौल व सीला यांस बंदिखान्यांत टाकतात व सोडूनहि देतात

१९ मग आपल्या मिळकतीची आशा गेली असें पाहून
तिच्या धन्यांनीं पौल व सीला यांस धरून अधिकाऱ्यांकडे
पेठेंत ओढून नेलें, २० आणि त्यांनीं त्यांस अधिकाऱ्यांपुढें
उभें करून म्हटलें, हे पुरुष यहूदी असून आमच्या नग-
राला फार त्रास देतात, २१ आणि आम्हां रोमी लोकांना
जे परिपाठ स्वीकारावयाला व आचरावयाला योग्य नाहींत
ते हे सांगतात. २२ तेव्हां लोक त्यांजवर उठले; आणि
अधिकाऱ्यांनीं त्यांचीं वस्त्रें फाडून काढून त्यांस छड्या
मारावयाची आज्ञा दिली.

२३ मग त्यांस पुष्कळसे फटके मारिल्यावर बंदिशाळेंत
टाकून त्यांनीं बंदिशाळेच्या नायकाला त्यांस बंदोबस्तानें
राखण्याचा हुकूम केला; २४ असा त्याला हुकूम मिळाल्यावर
त्यानें त्यांस आंतल्या बंदिखान्यांत घालून त्यांचे पाय
खोड्यांत अडकविले. २५ सुमारें मध्यरात्रीं पौल व सीला
हे देवाला प्रार्थना करीत व गाणें गात असतां बंदिवान
त्यांचें ऐकत होते. २६ तेव्हां एकाएकीं असा मोठा भूमि-
कंप झाला कीं बंदिशाळेचे पाये डळमळले; सर्व दरवाजे
लागलेच उघडले; व सर्वांचे बंद सुटले. २७ तेव्हां बंदि-
शाळेचा नायक झोपेंतून जागा होऊन त्यानें बंदिशाळेचे
दरवाजे उघडे पाहिले, आणि बंदिवान पळाले असतील
असें वाटून तरवार उपसून तो आपला घात करणार होता.
२८ इतक्यांत पौल मोठ्यानें ओरडून म्हणाला, तूं स्वतःला
कांहीं अपाय करून घेऊं नको; कारण आम्ही सर्व एथेंच
आहों. २९ मग दिवे आणवून तो आंत धावत गेला,
कांपत कांपत पौल व सीला यांच्या पायां पडला, ३० आणि
त्यांस बाहेर काढून म्हणाला, महाराज, माझें तारण व्हावें,
म्हणून मला काय केलें पाहिजे? ३१ ते म्हणाले, प्रभु येशू-
वर विश्वास ठेव, म्हणजे तुझें व तुझ्या घराण्याचें तारण
होईल. ३२ त्यांनीं त्याला व त्याच्या घरांतील सर्वांस प्रभूचें
वचन सांगितलें. ३३ मग रात्रीच्या त्याच घटकेस त्यानें
त्यांस जवळ घेऊन त्यांच्या जखमा धुतल्या; आणि तेव्हांच
त्यानें व त्याच्या सर्वांनीं बाप्तिस्मा घेतला. ३४ मग त्यानें
त्यांस घरीं नेऊन खाऊं घातलें, आणि देवावर विश्वास ठेवून
सहकुटुंब हर्ष केला.

३५ दिवस उगवल्यावर अधिकाऱ्यांनीं चोपदारांस
पाठवून सांगितलें कीं त्या माणसांस सोडून दे. ३६ तेव्हां
बंदिशाळेच्या नायकानें पौलास असें वर्तमान सांगितलें कीं
तुम्हांला सोडावें म्हणून अधिकाऱ्यांनीं माणसें पाठविलीं
आहेत; तर आतां स्वस्थपणें निघून जा. ३७ तेव्हां पौल
त्यांस म्हणाला, आम्ही रोमी मनुष्यें असतां अपराधी ठर-
विल्यावांचून त्यांनीं आम्हांस उघडपणें फटके मारून बंदि-
शाळेंत टाकिलें; आणि आतां ते आम्हांस गुप्तपणें घाल-
वितात काय? असें नको; तर त्यांनीं स्वतः येऊन आम्हांस
बाहेर न्यावें. ३८ मग चोपदारांनीं हें वर्तमान अधिका-
ऱ्यांस सांगितलें, तेव्हां ते रोमी आहेत असें ऐकून त्यांस
भय वाटलें. ३९ मग त्यांनीं येऊन त्यांची समजूत केली;
आणि त्यांस बाहेर आणून नगरांतून निघून जाण्याची
विनंति केली. ४० मग ते बंदिशाळेंतून निघून लुदियेच्या
घरीं गेले, बंधुवर्गास भेटून त्यांनीं त्यांचें समाधान केलें,
आणि तेथून ते मार्गस्थ झाले.

## थेस्सलनीका येथें पौल

१ नंतर ते अंफिपुली व अपुल्लोनिया यांच्या-
१७ मधून जाऊन थेस्सलनीकास गेले, तेथें यहुद्यांचें
सभास्थान होतें; २ तेथें पौलानें आपल्या परि-

पाठाप्रमाणें त्यांजकडे जाऊन शास्त्रावरून तीन शब्बाथ
त्यांच्याबरोबर संवाद केला. ३ त्यानें धर्मशास्त्राचा उलगडा
करून प्रतिपादन केलें कीं ख्रिस्तानें दुःख सोसावें व
मेलेल्यांमधून पुनः उठावें ह्याचें अगत्य होतें, आणि ज्या
येशूची मी तुम्हांला घोषणा करितों तोच तो ख्रिस्त आहे.
४ तेव्हां त्यांच्यांतील कित्येक जण, भक्तिमान् हेल्लेणी
यांचा मोठा समुदाय व बऱ्याच श्रेष्ठ स्त्रिया यांची खात्री
होऊन तीं पौल व सीला यांस येऊन मिळालीं; ५ परंतु
यहूद्यांनीं हेव्यानें आपणांकडे कांहीं बाजारचे लुच्चे लोक
घेऊन व घोळका जमवून नगरांत बंडाळी केली; आणि
यासोनाच्या घरावर हल्ला करून त्यांस लोकांकडे बाहेर
काढवून आणण्याची खटपट करून पाहिली; ६ परंतु
त्यांचा शोध लागला नाहीं, तेव्हां त्यांनीं यासोन व कित्येक
बंधु यांस नगराच्या अधिकाऱ्यांकडे ओढीत नेऊन आरडा-
ओरड करून म्हटलें, ज्यांनीं जगाची उलटापालट केली ते
येथेंहि आले आहेत; ७ त्यांस यासोनानें आपल्या घरांत
घेतलें आहे, आणि हे सर्व कैसराच्या हुकुमाविरुद्ध वागतात,
म्हणजे येशू म्हणून कोणीएक दुसरा राजा आहे असें म्हण-
तात. ८ हें ऐकून त्यांनीं लोकांस व शहराच्या अधिका-
ऱ्यांस खवळून सोडलें. ९ मग त्यांनीं यासोनाचा व इतरांचा
जामीन घेऊन त्यांस मोकळें केलें.

## बिरुया येथें पौल

१० यावर बंधुजनांनीं पौल व सीला यांस लागलेंच
रातोरात बिरुयास पाठविलें; ते तेथें पोहंचल्यावर यहूद्यांच्या
सभास्थानांत गेले. ११ तेथील लोक थेस्सलनी-
कांतल्या लोकांपेक्षां मोठ्या मनाचे होते; त्यांनीं
मोठ्या उत्सुकतेनें वचनाचा स्वीकार केला, आणि या
गोष्टी अशाच आहेत काय याविषयीं ते शास्त्रांत
प्रतिदिवशीं शोध करीत गेले. १२ यावरून त्यांतील
बहुतांनीं व हेल्लेणी कुलीन स्त्रिया व पुरुष यांतील
बऱ्याच जणांनीं विश्वास धरिला. १३ पौल देवाचें
वचन बिरुयांतहि सांगत आहे हें थेस्सलनीकांतल्या
यहूद्यांस समजलें, तेव्हां त्यांनीं तिकडेहि जाऊन लोकांस
खवळून चेतविलें. १४ त्यावरून बंधुवर्गानें पौलाला
समुद्राकडे जाण्यास लागलेंच पाठविलें; आणि सीला
व तीमथ्य हे तेथें राहिले. १५ तेव्हां पौलाला
पोहंचविणाऱ्यांनीं त्याला अथेनैपर्यंत नेलें; आणि सीला
व तीमथ्य यांनीं आपणांकडे होईल तितकें लवकर
यावें अशी त्याची आज्ञा घेऊन ते निघाले.

## अथेनै येथें पौल

१६ पौल अथेनैस त्यांची वाट पाहत असतां, तें
नगर मूर्तींनीं भरलेलें पाहून त्याच्या मनाचा संताप
झाला. १७ यामुळें तो सभास्थानांत यहूद्यांबरोबर,
भक्तिमान् लोकांबरोबर आणि बाजारांत जे त्याला
आढळत त्यांजबरोबर प्रतिदिवशीं वाद करीत असे.
१८ तेव्हां एपिकूरपंथी व स्तोयिकपंथी यांच्यांतील
कित्येक तत्त्वज्ञानी लोक त्याला आडवे आले. कित्येक
म्हणाले, हा बडबड्या काय बोलतो? दुसरे म्हणाले,
हा परक्या देवांची घोषणा करणारा दिसतो; कारण
तो त्यांस येशू व पुनरुत्थान यांविषयीं सुवार्ता गाज-
वीत असे. १९ नंतर त्यांनीं त्याला धरून अरीय-
पगावर नेऊन म्हटलें, तूं हें दिलेलें नवें शिक्षण
काय आहे हें आम्हांस कळविशील काय? २० कारण
तूं आम्हांस अपरिचित गोष्टी ऐकवीत आहेस, त्यांचा
अर्थ काय हें समजावें अशी आमची इच्छा आहे.
२१ (सर्व अथेनैकर व तेथें राहणारे परके लोक ह्यांना
कांहीं नवलविशेष सांगणें किंवा ऐकणें याशिवाय
इतर कशांतहि आपला काळ घालविणें होत नसे.)

## अरीयपगांत पौलानें केलेलें भाषण

२२ तेव्हां पौल अरीयपगाच्या मध्यभागीं उः
राहून म्हणाला:

अहो अथेनैकरांनो, तुम्ही देवदैवतांला फार मान
देणारे आहां असें मला दिसतें. २३ कां तर मीं फिरतां
फिरतां तुमच्या पूज्य वस्तु पाहिल्या, त्यांत 'अज्ञात
देवाला' हीं अक्षरें लिहिलेली वेदी मला आढळली. ज्याचें
तुम्ही न ओळखतां भजन करितां तें मी तुम्हांला जाहीर
करितों. २४ ज्या देवानें जग व त्यांतलें अवघें केलें
तो आकाशाचा व पृथ्वीचा प्रभु आहे, म्हणून तो
हातांनीं बांधिलेल्या मंदिरांत राहत नाहीं; २५ आणि
त्याला कांहीं उणें आहे, म्हणून मनुष्यांच्या हातांनीं

त्याची सेवा घडावी असें नाहीं; तर जीवन, प्राण व सर्व कांहीं तोच सर्वांस देतो; २६ आणि एका-पासून मनुष्यांचीं सर्व राष्ट्रें उत्पन्न करून त्यांनीं सगळ्या भूपृष्ठभागावर राहावें असें त्यानें केलें, आणि त्यांचे नेमलेले समय व त्यांच्या वस्तीच्या सीमा त्यानें ठरविल्या; २७ अशासाठीं कीं त्यांनीं देवाचा शोध करावा, म्हणजे चाचपडत चाचपडत त्याला कसें तरी मिळवून घ्यावें. तो आपल्यांतल्या कोणाएकापासूनहि दूर नाहीं; २८ कारण आपण त्यांत जगतों, वागतों, व आहों; तसेंच तुमच्या कवींपैकींहि कित्येकांनीं म्हटलें आहे, 'आपण त्याचा वंश आहों.' २९ तर आपण दैवी वंश असतांना, मनुष्याच्या चातुर्यानें व कल्पनेनें कोरलेलें सोनें, रुपें किंवा पाषाण ह्यांच्या आकृती-सारिखा देव आहे असें आपल्याला वाटूं नये. ३० अज्ञानाच्या काळांची देवानें उपेक्षा केली, परंतु आतां सर्वांनीं सर्वत्र पश्चात्ताप करावा अशी तो मनुष्यांस आज्ञा करितो. ३१ त्यानें असा एक दिवस नेमस्त केला आहे कीं त्या दिवशीं आपण नेमिलेल्या मनुष्याच्या द्वारें तो जगाचा न्यायनिवाडा नीतिमत्त्वानें करवील; त्यानें त्याला मेलेल्यांमधून उठवून याविषयींचें प्रमाण सर्वांस पटविलें आहे.

३२ तेव्हां मृतांच्या पुनरुत्थानाविषयीं ऐकून कित्येकांनीं थट्टा केली; कित्येक म्हणाले, याविषयीं आम्ही तुझें पुनः आणखी ऐकूं. ३३ इतकें झाल्यावर पौल त्यांच्यामधून निघून गेला. ३४ तरी त्यास चिकटून राहून कित्येक मनुष्यांनीं विश्वास धरिला; त्यांत दिओनुस्य अरीयपगीयकर, दामारि नामें कोणी स्त्री, व त्यांच्याबरोबर इतर कित्येक होते.

## करिंथ येथें पौल

१८ १ त्यानंतर तो अथेनै सोडून करिंथास गेला. २ तेव्हां पंत एथील अक्विला नामें कोणी यहूदी त्याला आढळला; सर्व यहूद्यांनीं रोम शहर सोडून जावें अशी क्लौद्यानें आज्ञा केल्या-मुळें तो आपली बायको प्रिस्किल्ला इजसुद्धां इटालीहून नुकताच आला होता; त्यांच्याकडे तो गेला; ३ आणि त्यांचा व त्याचा धंदा एक असल्यामुळें त्यांच्याजवळ राहिला, आणि त्यांनीं तो चालविला; त्यांचा धंदा राहुट्या करण्याचा होता. ४ तो दर शब्बाथ दिवशीं सभास्थानांत वाद करून यहूद्यांची व हेल्लेण्यांची समजूत घालीत असे.

५ जेव्हां सीला व तीमथ्य हे मासेदोनियाहून आले तेव्हां, येशू हाच ख्रिस्त आहे, अशी साक्ष यहूद्यांस देऊन वचन सांगण्यांत पौल निमग्न झाला होता; ६ आणि ते त्याला अडवून अपशब्द बोलूं लागले तेव्हां त्यानें आपलीं वस्त्रें झटकून त्यांस म्हटलें, तुमचें रक्त तुमच्या माथ्यांवर; मी निर्दोष आहें; आतांपासून मी विदेशी लोकांकडे जाणार. ७ मग तेथून निघून सभास्थानाच्या लगत ज्याचें घर होतें, असा कोणी तीत युस्त नामक देवभक्त होता त्याच्या घरीं तो गेला. ८ तेव्हां सभेचा अधिकारी क्रिस्प ह्यानें आपल्या सर्व घराण्यासुद्धां प्रभूवर विश्वास ठेविला, आणि पुष्कळ करिंथकरांनीं वचन ऐकून विश्वास ठेविला, व बाप्तिस्मा घेतला. ९ तेव्हां प्रभूनें रात्रीं पौलाला दृष्टांतांत म्हटलें, भिऊं नको; बोलत जा, उगा राहूं नको, १० मी तुजबरोबर आहें, तुझें वाईट करावयाला कोणी तुजवर येणार नाहीं, कारण या नगरांत माझे पुष्कळ लोक आहेत. ११ तो त्यांजमध्यें देवाचें वचन शिकवीत दीड वर्ष राहिला.

## गल्लियो आणि पौल

१२ नंतर गल्लियो हा अखया प्रांताचा अधिकारी असतां यहूद्यांनीं एकचित्तानें पौलावर उठून त्याला न्याया-सनापुढें आणून म्हटलें, १३ हा लोकांस नियमशास्त्रा-विरुद्ध देवाला भजावयास मनवितो. १४ तेव्हां पौल तोंड उघडून बोलणार होता इतक्यांत गल्लियो यानें यहूद्यांस म्हटलें, अहो यहूद्यांनो, हें प्रकरण गैरशिस्त वर्तनाचें अगर दुष्कृतीचें असतें तर मला तुमचें म्हणणें मनावर घेण्याचें कारण झालें असतें; १५ परंतु हा वाद शब्दांचा, नांवांचा किंवा तुमच्या नियमशास्त्राचा आहे, तर तुमचें तुम्हीच पाहा; या गोष्टींची न्यायाधिशी मला नको. १६ असें म्हणून त्यानें त्यांस न्यायासनापुढून हाकून लाविलें. १७ तेव्हां

सर्वांनीं सभेचा अधिकारी सोस्थनेस याला धरून न्यायासनासमोर मार दिला, पण गल्लियोनें यांपैकीं कोणत्याहि गोष्टीची पर्वा केली नाहीं.

### पौल सूरियास परत येतो

१८ यानंतर पौल तेथें आणखी बरेच दिवस राहिल्यावर बंधुजनांचा निरोप घेऊन तारवांत बसून सूरिया देशास गेला; त्याच्याबरोबर प्रिस्किल्ला व अक्किला हीं गेलीं; त्याचा नवस होता म्हणून त्यानें किंख्रियांत आपल्या डोक्याचे केस कापिले. १९ मग इफिस नगरांत आल्यावर त्यानें त्यांस तेथें सोडिलें; आणि स्वतः सभास्थानांत जाऊन यहूद्यांबरोबर संवाद केला. २० नंतर त्यानें आणखी कांहीं दिवस राहावें अशी ते विनंति करीत असतांहि तो कबूल झाला नाहीं; २१ तर त्यांचा निरोप घेतांना, देवाची इच्छा असल्यास तुम्हांकडे मी फिरून येईन, असें म्हणून इफिसाहून तारवांत बसून निघाला. २२ मग कैसरीयास पोहंचल्यावर तो वरतीं गेला, आणि मंडळीला प्रणाम करून अंत्युखियास खालीं गेला. २३ तेथें कांहीं दिवस राहून तो निघाला, आणि अनुक्रमानें गलतिया प्रांत व फ्रुगिया यांतील सर्व शिष्यांस स्थिर करीत फिरला.

### इफिसमध्यें अपुल्लो

२४ तेव्हां अपुल्लो नांवाचा मोठा वक्ता व शास्त्रसंपन्न असा एक आलेक्सांद्रियाकर यहूदी होता, तो इफिसास आला. २५ त्याला प्रभूच्या मार्गाविषयींचें शिक्षण मिळालेलें होतें; आणि तो आत्म्यानें आवेशी असल्यामुळें येशूविषयींच्या गोष्टी नीट सांगून शिक्षण देत असे; तरी त्याला योहानाचा बाप्तिस्मा मात्र ठाऊक होता. २६ तो सभास्थानांत निर्भीडपणें बोलूं लागला, तेव्हां प्रिस्किल्ला व अक्किला यांनीं त्याचें ऐकून त्याला जवळ घेतलें, व देवाचा मार्ग त्याला अधिक स्पष्टपणें दाखविला. २७ नंतर त्यानें अखया प्रांतांत जाण्याचा बेत केला, तेव्हां बंधुवर्गानें त्यास उत्तेजन दिलें आणि त्याचा स्वीकार करण्याविषयीं शिष्यांस लिहिलें; तो तेथें पोहंचल्यावर ज्यांनीं कृपेच्या द्वारें विश्वास धरिला होता त्यांना त्यानें फार साहाय्य केलें; २८ कारण येशू हाच ख्रिस्त आहे, असें त्यानें शास्त्रावरून दाखवून मोठ्या सामर्थ्यानें सर्वांसमक्ष यहूद्यांचें खंडण केलें.

### इफिस येथें बाप्तिस्मा करणाऱ्या योहानाचे शिष्य

१९ १ मग असें झालें कीं अपुल्लो करिंथांत असतां पौल वरच्या प्रांतांमधून जाऊन इफिसास पोहंचला, तेथें कित्येक शिष्य त्याला आढळले; २ त्यांस तो म्हणाला, तुम्हीं विश्वास धरिला तेव्हां तुम्हांस पवित्र आत्मा मिळाला काय? त्यांनीं त्याला म्हटलें, पवित्र आत्मा दिलेला आहे हें आम्हीं ऐकलें देखील नाहीं. ३ तो त्यांस म्हणाला, तर तुम्हीं कसला बाप्तिस्मा घेतला? ते म्हणाले, योहानाचा बाप्तिस्मा. ४ पौलानें म्हटलें, योहान पश्चात्तापाचा बाप्तिस्मा देत असे; तो लोकांस सांगत असे कीं माझ्यामागून येणाऱ्यावर म्हणजे येशूवर तुम्हीं विश्वास ठेवावा. ५ हें ऐकून त्यांनीं प्रभु येशूच्या नामांत बाप्तिस्मा घेतला; ६ आणि पौलानें त्यांजवर हात ठेविले तेव्हां पवित्र आत्मा त्यांजवर आला; ते वेगवेगळ्या भाषा बोलूं लागले व ईश्वरी संदेश देऊं लागले. ७ ते अवघे सुमारें बारा पुरुष होते.

### इफिस येथें पौल

८ नंतर तो सभास्थानांत जाऊन देवाच्या राज्याच्या गोष्टीविषयीं संवाद करीत व प्रमाण पटवीत निर्भीडपणें तीन महिने बोलत गेला. ९ मग कित्येक जण कठोर व विरोधी होऊन लोकांसमक्ष त्या मार्गाची निंदा करूं लागले, तेव्हां त्यानें त्यांजमधून निघून शिष्यांसहि वेगळे केले, आणि तुरन्नाच्या शिक्षणगृहांत तो प्रतिदिवशीं संवाद करूं लागला. १० असें दोन वर्षें चालल्यामुळें आसियांत राहणाऱ्या सर्व यहूदी व हेल्लेणी लोकांनीं प्रभूचें वचन ऐकलें. ११ देवानें पौलाच्या हातून असाधारण चमत्कार घडविले; १२ ते असे कीं रुमाल किंवा फडकीं त्याच्या अंगावरून आणून रोग्यांवर घातलीं, म्हणजे त्यांचे रोग

दूर होत असत व दुष्ट आत्मे त्यांच्यांतून निघून जात असत. १३ तेव्हां कित्येक पंचाक्षरी फिरस्ते यहूदी, दुष्ट आत्मे लागलेल्या लोकांवर प्रभु येशूचें नाम उच्चारून म्हणूं लागले, ज्या येशूची पौल घोषणा करितो त्याची मी तुम्हांस शपथ घालतों. १४ असें करणारे इसम एक यहूदी मुख्य याजक स्किवा याचे सात पुत्र होते. १५ त्यांस दुष्ट आत्म्यानें जबाब दिला, मी येशूला व पौलालाहि ओळखतों; पण तुम्ही कोण आहां? १६ मग ज्या मनुष्यास दुष्ट आत्मा लागला होता त्यानें त्यांजवर उडी घालून दोघांस हटविलें आणि त्यांवर इतका पगडा बसविला कीं ते उघडेनागडे व घायाळ होऊन त्या घरांतून पळून गेले. १७ तेव्हां इफिसांत राहणारे यहूदी व हेल्लेणी या सर्वांस हें माहीत होऊन भय प्राप्त झालें, आणि प्रभु येशूच्या नामाचा महिमा झाला. १८ विश्वास ठेवणाऱ्या लोकांपैकीं पुष्कळ जणांनीं येऊन आपलीं कृत्यें पदरीं घेऊन तीं उघड केलीं. १९ जादू करणाऱ्यांतील बऱ्याच लोकांनीं आपलीं पुस्तकें जमा करून सर्वांदेखतां जाळून टाकलीं; आणि त्यांच्या किंमतीची बेरीज केली तेव्हां ती पन्नास हजार रुपये झाली. २० याप्रमाणें प्रभूचें वचन सामर्थ्यानें वाढत जाऊन प्रबळ झालें.

## पौलाचे पुढले बेत

२१ हें झाल्यावर मासेदोनिया व अखया ह्या प्रांतांतून यरुशलेमास जावें असा पौलानें आपल्या मनांत निश्चय केला व म्हटलें, तेथें गेल्यानंतर मला रोम शहरहि पाहिलें पाहिजे. २२ मग आपली सेवा करणाऱ्यांपैकीं तीमथ्य व एरास्त या दोघांस मासेदोनियास पाठवून तो स्वतः कांहीं दिवस आसियांत राहिला.

## इफिस येथील दंगा

२३ ह्या सुमारास त्या मार्गाविषयीं बरीच चळवळ झाली. २४ कारण कीं देमेत्रिय नांवाचा कोणीएक सोनार अर्तमी देवीचे रुप्याचे देव्हारे करून कारागिरांस बराच कामधंदा लावून देत असे; २५ त्यानें त्यांस व तसल्याच इतर कारागिरांस जमवून म्हटलें, गड्यांनो, ह्या धंद्यानें आपल्याला पैसे मिळतात हें तुम्हांस ठाऊक आहे. २६ तुम्ही पाहतां व ऐकतां कीं इफिसांत केवळ नव्हे तर बहुतेक सर्व आसिया देशांत, हातांनीं केलेल्या आकृति देव नाहींत असें या पौलानें बोलून व पुष्कळ लोकांच्या मनांत भरवून त्यांना फितविलें आहे; २७ ह्यामुळें ह्या आपल्या धंद्याची अपकीर्ति होईल असें भय आहे; इतकेंच नव्हे, तर ज्या महादेवी अर्तमीची भक्ति सर्व आसिया व जगहि करितें, तिचें देऊळ तुच्छवत् व ती स्वतः महत्त्वभ्रष्ट होईल असेंहि भय आहे. २८ हें ऐकल्यावर ते क्रोधाविष्ट होऊन ओरडूं लागले कीं इफिसकरांची अर्तमी थोर. २९ इतक्यांत नगरांत धांदल उडाली; आणि पौलाचे वाटेंतले सोबती मासेदोनियाकर गायस व अरिस्तार्ख यांस पकडून त्यांस ओढीत ओढीत ते एकचित्तानें नाटकगृहांत धावत गेले. ३० तेव्हां गर्दींत जावें असें पौलाच्या मनांत होतें, पण शिष्यांनीं त्याला जाऊं दिलें नाहीं. ३१ शिवाय आसियाच्या अधिकाऱ्यांतील कित्येक त्याचे मित्र होते, त्यांनीं त्याला निरोप पाठवून विनंति केली कीं नाटकगृहांत जाऊन स्वतःला धोक्यांत घालूं नये. ३२ तेव्हां कोणीं कांहीं, कोणीं कांहीं, अशा आरोळ्या मारल्या; लोकांचा एकच गोंधळ उडाला; आणि आपण कशाला जमलों आहों हें बहुतेकांस कळलें नाहीं. ३३ मग अलेक्सांद्र याला यहूदी लोकांनीं पुढें ढकलल्यावर कित्येकांनीं त्याला गर्दींतून बाहेर ओढिलें; तेव्हां अलेक्सांद्र हातानें खुणावून लोकांची समजूत घालण्यास पाहत होता; ३४ परंतु तो यहूदी आहे असें समजल्यावर, सुमारें दोन तासपर्यंत, इफिसकरांची अर्तमी थोर, अशी सर्वांची एकच आरोळी झाली. ३५ मग नगराचा शिरस्तेदार लोकांना शांत करून म्हणाला, अहो इफिसकरांनो, महान् अर्तमीचा व ज्युपितरापासून पडलेल्या मूर्तीचा पुजारी इफिस नगर आहे, हें ज्याला ठाऊक नाहीं असा कोण माणूस आहे? ३६ या गोष्टी निर्विवाद आहेत म्हणून तुम्हीं शांत असावें, कांहीं उतावळी करूं नये. ३७ कारण जीं मनुष्यें, तुम्हीं एथें आणिलीं आहेत तीं देवालय लुटणारीं किंवा आपल्या देवीची निंदा करणारीं अशीं नाहींत. ३८ यास्तव देमेत्रिय व त्याच्या सोबतीचे कारागीर यांचा कोणाशीं वाद असल्यास न्यायगृहें उघडीं आहेत व न्यायाधीशहि आहेत, त्यांजपुढें त्यांनीं एकमेकांवर आरोप

ठेवावा; ३९ पण दुसऱ्या एखाद्या गोष्टीची मागणी असली तर तीबद्दल कायदेशीर सभेंत ठरविलें जाईल. ४० या दंगलाचें कारण काय त्याचा जबाब आपणांस देतां येण्यासारखा नसल्यामुळें आजच्या प्रसंगावरून आपणांवर बंड केल्याचा आरोप येण्याचें भय आहे. ४१ असें बोलून त्यानें सभा विसर्जन केली.

## मासेदोनिया, ग्रीस व त्रोवस येथें पौल

२० १ नंतर गलबला निवाल्यावर पौलानें शिष्यांस बोलावून त्यांस बोध केला, व त्यांचा निरोप घेऊन तो मासेदोनियास जाण्यास निघाला. २ त्या प्रांतांतून जातांना तेथल्या लोकांस पुष्कळ बोध करून तो हेल्लास प्रांतांत गेला; ३ तेथें तीन महिने राहिल्यावर तो सूरिया देशांत तारवांतून जाणार होता, तेव्हां यहूदी लोकांनीं त्याजविरुद्ध कट केला, म्हणून त्यानें मासेदोनियांतून परत जाण्याचा बेत केला. ४ पुर्राचा पुत्र सोपत्र बिरुयाकर, थेस्सलनीकाकरांतले अरिस्तार्ख व सकूंद, गायस दर्बेकर, तीमथ्य, आणि आसियांतील तुखिक व त्रफिम हे आसियापर्यंत त्याच्याबरोबर गेले. ५ ते पुढें जाऊन त्रोवसांत आमची वाट पाहत राहिले; ६ आणि बेखमीर भाकरींच्या दिवसांनंतर आम्ही फिलिप्पैहून तारवांत बसून पांच दिवसांनीं त्रोवसांत त्यांजकडे आलों; तेथें आम्ही सात दिवस राहिलों.

## युतुख

७ मग आम्ही आठवड्याच्या पहिल्या दिवशीं भाकर मोडण्यासाठीं एकत्र मिळालों, तेव्हां पौल दुसऱ्या दिवशीं जाणार होता; म्हणून त्यानें त्यांच्याबरोबर भाषण केलें, तें मध्यरात्रपर्यंत लांबलें. ८ ज्या माडीवर आम्ही एकत्र जमलों होतों तेथें बरेच दिवे होते; ९ आणि युतुख नामें कोणी तरुण खिडकींत बसला असतां त्याला गुंगी येऊन गाढ झोप लागली. तेव्हां पौल एकसारखा बोलत राहिल्यामुळें तो त्या झोपेच्या भरांत तिसऱ्या मजल्यावरून खालीं पडला व मेलेला हातीं लागला. १० तेव्हां पौल खालीं उतरला आणि त्याजवर पाखर घालून त्याला कवटाळून म्हणाला, घाबरूं नका; कारण याचा जीव यांत आहे. ११ मग त्यानें वर येऊन भाकर मोडून खाल्ल्यावर बराच वेळ म्हणजे पहाटपर्यंत त्यांजबरोबर संभाषण केलें व तो तसाच निघाला. १२ त्या तरुणाला जीवंत नेतां आल्यामुळें त्यांना अतिशय समाधान वाटलें.

## मिलेताचा प्रवास

१३ आम्ही अगाऊ जाऊन तारवांत बसून अस्साकडे गेलों, तेथें पोहंचल्यावर पौलाला तारवांत घ्यावयाचें होतें; कारण त्यानें तसें ठरविलें होतें व तो स्वतः पायवाटेनें यावयाचा होता. १४ तो अस्सांत आम्हांस भेटला, तेव्हां त्याला तारवांत घेऊन आम्ही मितुलेनास आलों. १५ तेथून तारवांतून आम्ही दुसऱ्या दिवशीं खियासमोर आलों; आणि त्याच्या पुढील दिवशीं सामा बंदर केलें; मग [त्रोगुल्यांत राहिल्यावर] त्याच्या पुढील दिवशीं मिलेतास आलों. १६ आपणाला आसियामध्यें फार दिवस राहावें लागूं नये म्हणून इफिस बाजूला सोडून जावयाचा पौलानें निश्चय केला होता; कारण कसेंहि करून पन्नासाव्या दिवसाच्या सणांत आपण यरुशलेमांत असावें यासाठीं तो घाई करीत होता.

## इफिसकऱ्या वडीलवर्गाशीं मिलेत येथें पौलानें वियोगसमयीं केलेलें भाषण

१७ मग त्यानें मिलेताहून इफिसांत निरोप पाठवून मंडळीच्या वडीलवर्गास बोलावून घेतलें. १८ ते त्याच्याजवळ आल्यावर त्यानें त्यांस म्हटलें:

मी आसियांत पहिल्यानें पाऊल टाकिल्या दिवसापासून तुम्हांबरोबर नेहमीं कसा होतों, १९ म्हणजे फार नम्रतेनें, आसवें गाळीत आणि यहूद्यांच्या कटांमुळें मजवर आलेलीं संकटें सोशीत मीं प्रभूची सेवा कशी केली, हें तुम्हांस ठाऊक आहे; २० जें हितकारक तें तुम्हांस सांगण्यास आणि चार लोकांत व घरोघरीं शिकविण्यास मीं माघार घेतली नाहीं; २१ पश्चात्ताप करून देवाकडे वळणें व आपल्या प्रभु येशू ख्रिस्तावर विश्वास ठेवणें यांसंबंधानें यहूदी व हेल्लेणी यांस मी साक्ष देत होतों. २२ पण आतां पाहा, मी अंतर्यामीं बद्ध होऊन यरुशलेमास जात आहें, तेथें मला काय काय होईल तें माहीत नाहीं; २३ केवळ इतकें कळतें कीं बंधनें व संकटें माझी वाट पाहत आहेत, आणि पवित्र आत्मा याची मला नगरो-

मजवरीं साक्ष देत आहे. २४ मी तर आपल्या प्राणाची किंमत एवढीसुद्धां करीत नाहीं, यासाठीं कीं मीं आपली धाव आणि मला प्रभु येशूपासून प्राप्त झालेली देवाच्या कृपेची सुवार्ता निश्चितार्थानें सांगण्याची सेवा शेवटास न्यावी. २५ आतां पाहा, ज्यांच्यामध्यें मी ह्या राज्याची घोषणा करीत फिरतों त्या तुम्हां कोणाच्याहि माझें तोंड पुनः दृष्टीस पडणार नाहीं, हें मला ठाऊक आहे, २६ म्हणून आजच्या दिवशीं तुम्हांस साक्ष देतों कीं मी सर्वांच्या रक्ताविषयीं निर्दोषी आहें; २७ कारण देवाचा संपूर्ण मनोरथ तुम्हांस सांगण्यास मीं माघार घेतली नाहीं. २८ आतां तुम्ही आपणांकडे व ज्या कळपांत पवित्र आत्म्यानें तुम्हांस अध्यक्ष करून ठेविलें त्या सर्वांकडे लक्ष द्या, यासाठीं कीं देवाची जी मंडळी त्यानें आपल्या रक्तानें मिळविली तिचें पाळण तुम्हीं करावें. २९ मी गेल्यावर कळपाची दया न करणारे असे क्रूर लांडगे तुम्हांमध्यें शिरतील हें मी जाणून आहें; ३० तुम्हांपैकींहि कांहीं मनुष्यें उठून शिष्यांस आपल्यामागें ओढण्यासाठीं विपरीत गोष्टी बोलतील. ३१ यास्तव सावध असा, आणि मीं तीन वर्षें रात्रंदिवस अश्रु गाळीत प्रत्येकास बोध करणें थांबविलें नाहीं याची आठवण ठेवा. ३२ आतां मी तुम्हांस देवाकडे व त्याच्या कृपेच्या वचनाकडे निरवितों; तो तुमची वृद्धि करावयास व पवित्र केलेल्या सर्व जणांमध्यें तुम्हांस वतन द्यावयास समर्थ आहे. ३३ मीं कोणाच्या सोन्याचा, रुप्याचा किंवा वस्त्रांचा लोभ धरिला नाहीं. ३४ माझ्या व माझ्या सोबत्यांच्या गरजा भागविण्याकरितां याच हातांनीं सेवा केली, हें तुम्ही स्वतः जाणून आहां. ३५ सर्व गोष्टींत मीं तुम्हांस कित्ता घालून दाखविलें कीं तसेंच श्रम करून तुम्ही दुर्बळांना साहाय्य करावें, आणि घेण्यापेक्षां देणें ह्यांत धन्यता आहे असें जें प्रभु येशू स्वतः म्हणाला, त्या वचनाची आठवण ठेवावी.

३६ असें बोलल्यावर त्यानें गुडघे टेकून त्या सर्वांबरोबर प्रार्थना केली. ३७ तेव्हां ते सर्व फार रडले व त्यांनीं पौलाच्या गळ्यांत गळा घालून त्याचे मुके घेतले. ३८ माझें तोंड पुनः पुढें तुमच्या दृष्टीस पडणार नाहीं, असें जें त्यानें म्हटलें होतें त्यावरून त्यांस विशेष दुःख वाटलें. मग त्यांनीं त्याला तारवापर्यंत पोहंचविलें.

## मिलेतापासून सोरापर्यंत येणें

१ मग असें झालें कीं आमच्यांचा कष्टानें
२१ वियोग झाल्यानंतर आम्ही तारवांतून कोसास नीट
गेलों, व दुसऱ्या दिवशीं ऱ्होदास व तेथून पात-
ऱ्यास गेलों; २ नंतर पलीकडे फेनीकेस जाणारें तारूं
मिळाल्यावर त्यांत बसून आम्हीं निघालों; ३ मग कुप्र
दृष्टीस पडलें तेव्हां तें डावीकडे टाकून आम्ही सूरिया-
कडे जाऊन सोरास उतरलों, कारण तेथें तारवांतील माल
उतरावयाचा होता; ४ आणि शोधांतीं आम्हांस शिष्य
भेटले म्हणून आम्ही तेथें सात दिवस राहिलों; त्यांनीं
आत्म्याच्या द्वारें पौलाला म्हटलें, तूं यरुशलेमांत पाऊल
टाकूं नये. ५ मग असें झालें कीं ते दिवस गेल्यावर
आम्ही तेथून निघून मार्गस्थ झालों; तेव्हां स्त्रिया व मुलें
यांच्यासुद्धां सर्वांनीं आम्हांस नगराबाहेर पोंहचविलें, तेथें
समुद्राच्या तीरीं आम्हीं गुडघे टेकून प्रार्थना केली; ६
एकमेकांचा निरोप घेतल्यावर आम्ही तारवांत बसलों,
आणि ते आपल्या घरीं माघारे गेले.

## कैसरीयास येणें

७ मग सोरापासूनचा आम्हीं आपला जलप्रवास संप-
विला, आणि प्तलमैसास येऊन व बंधुवर्गास भेटून त्यांच्या
एथें एक दिवस राहिलों. ८ दुसऱ्या दिवशीं आम्ही निघून
कैसरीयास आलों, आणि सुवार्तिक फिलिप्प याच्या घरीं
जाऊन राहिलों; हा सातांपैकीं एक होता. ९ त्याला चार
अविवाहित कन्या असून त्या ईश्वरसंदेश देत असत. १०
तेथें आम्ही पुष्कळ दिवस राहिलों असतां अगब नावें
कोणीएक संदेष्टा यहूदीयाहून खालीं आला. ११ त्यानें
आम्हांकडे येऊन व पौलाचा कमरबंद घेऊन आपले हात-
पाय बांधून म्हटलें, पवित्र आत्मा असें म्हणतो, ज्या
मनुष्याचा हा कमरबंद आहे त्याला यरुशलेमांत यहुदी
लोक याप्रमाणें बांधून विदेशी लोकांच्या हातीं देतील. १२
हें ऐकून आम्हीं व तेथल्या लोकांनींहि तूं यरुशलेमांत जाऊं
नये, अशी त्याला विनंति केली. १३ तेव्हां पौलानें उत्तर
दिलें, तुम्ही रडून माझें मन खचवितां हें काय? मी
नुसता बंधांत पडण्यासच नव्हे, तर प्रभु येशूच्या नामा-

साठीं यरुशलेमांत मरावयास देखील तयार आहें. १४ तो ऐकत नाहीं हें पाहून आम्हीं स्वस्थ राहून म्हटलें, प्रभूच्या इच्छेप्रमाणें होवो.

### यरुशलेमास येणें

१५ त्या दिवसांनंतर आम्ही आपली तयारी करून यरुशलेमास वर गेलों. १६ आमच्याबरोबर कैसरीयांतील कित्येक शिष्यहि आले, त्यांनीं आपल्याबरोबर कुप्र एथील म्नासोन, ह्या जुन्या शिष्यास आणिलें; त्याच्या येथें आम्हांस राहावयाचें होतें. १७ यरुशलेमास आल्यावर बंधुजनांनीं आनंदानें आमचें आगतस्वागत केलें.

### यहूद्यांतून ख्रिस्ती झालेल्यांची समजूत घालण्यासाठीं पौलानें केलेला प्रवास

१८ मग दुसऱ्या दिवशीं पौल आम्हांसुद्धां याकोबाच्या येथें गेला; आणि सर्व वडीलवर्गहि तेथें आला. १९ तेव्हां त्यानें त्यांस भेटून आपल्या सेवेच्या योगें जीं कार्यें देवानें विदेशी लोकांमध्यें केलीं त्यांपैकीं एकेक सविस्तर सांगितलें. २० तें ऐकून त्यांनीं देवाचें गौरव केलें, व त्याला म्हटलें, भाऊ, ज्यांनीं विश्वास ठेविला आहे असे यहूद्यांमध्यें किती हजारों लोक आहेत हें तूं पाहतोस; ते सर्व नियमशास्त्राभिमानी आहेत; २१ तुजविषयीं त्यांस असें कळविण्यांत आलें आहे कीं तूं विदेशी लोकांत राहणाऱ्या सर्व यहूद्यांस मोशाचा त्याग करावयास शिकवितोस आणि आपल्या मुलांची सुंता करूं नये, व परिपाठांप्रमाणें चालूं नये असेंहि सांगतोस. २२ तर आतां काय करावें ? तूं आला आहेस हें ते खचीत ऐकतील. २३ यास्तव आम्ही तुला जें सांगतों तें कर; नवस केलेले असे आमच्यांत चौघे जण आहेत; २४ त्यांस घेऊन त्यांच्यासह तूं व्रतस्थ हो, आणि त्यांनीं मुंडण करावें म्हणून त्यांचा खर्च तूं कर, म्हणजे तुजविषयीं जें कळविण्यांत आलें आहे त्यांत कांहीं अर्थ नसून तूं स्वतः नियमशास्त्र पाळून व्यवस्थेनें वागतोस असें सर्वांस समजेल; २५ परंतु ज्यांनीं विश्वास ठेविला आहे अशा विदेश्यांसंबंधानें आम्हीं निर्णय करून लिहून पाठविलें आहे कीं त्यांनीं मूर्तीस अर्पिलेले पदार्थ, रक्त, गुदमरून मेलेले प्राणी व व्यभिचार यांपासून आपणांस राखावें. २६ तेव्हां पौल त्या मनुष्यांस घेऊन दुसऱ्या दिवशीं त्यांच्याबरोबर व्रतस्थ होऊन मंदिरांत गेला, आणि ज्या दिवशीं त्यांच्यांतील एकेकासाठीं अर्पण करावयाचें त्या दिवसापर्यंत व्रताचे दिवस आपण पूर्ण करीत आहों असें त्यानें दर्शविलें.

### यरुशलेमांतला दंगा व पौलाला अटक

२७ पुढें ते सात दिवस पूर्ण होणार होते, तेव्हां आसियांतले यहूदी यांनीं त्याला मंदिरांत पाहून सर्व लोकसमुदायाला चेतविलें, आणि त्याजवर हात टाकून २८ आरोळी मारून म्हटलें, अहो इस्राएल लोकांनो, धावा हो धावा; आपले लोक, नियमशास्त्र व हें स्थळ यांविरुद्ध जो सर्व ठिकाणीं सर्वांस शिकवितो तो हाच आहे; शिवाय यानें हेल्लेण्यांस मंदिरांत आणून हें पवित्रस्थान विटाळविलें आहे. २९ यांनीं त्रफिम इफिसकर याला पूर्वी त्याच्याबरोबर नगरांत पाहिलें होतें; त्याला पौलानें मंदिरांत आणिलें असावें, अशी त्यांची कल्पना होती. ३० तेव्हां सर्व नगर गलबलून लोकांची एकच गर्दी झाली; आणि त्यांनीं पौलाला धरून मंदिरांतून बाहेर ओढून काढिलें; तोंच दरवाजे बंद झाले. ३१ मग ते त्याला जिवें मारावयाला पाहत असतां पलटणाच्या सरदाराकडे बातमी लागली कीं सर्व यरुशलेमांत गडबड उडाली आहे. ३२ तेव्हांच तो शिपाई व जमादार यांस घेऊन त्यांजकडे खालीं धांवत गेला. सरदार व शिपाई यांस पाहून ते पौलाला मारितांना थांबले. ३३ तेव्हां सरदारानें जवळ येऊन त्याला धरिलें आणि दोन सांखळ्यांनीं बांधण्यास हुकूम केला; मग हा कोण व यानें काय केलें असें त्यानें विचारिलें. ३४ तेव्हां लोकांतून कोणी कांहीं, कोणी कांहीं ओरडले; ह्या गलबल्यामुळें त्याला खात्रीलायक असें कांहीं कळेना, म्हणून त्यानें त्याला गढींत नेण्याचा हुकूम केला. ३५ तो पायऱ्यांवर आला तेव्हां असें झालें कीं लोकांच्या दांडगाव्यामुळें शिपायांनीं त्याला उचलून नेलें; ३६ कारण लोकांचा समुदाय मागें चालत असून, याची वाट लाव, असें ओरडत होता.

३७ मग पौलाला गढींत नेणार इतक्यांत त्यानें

सरदाराला म्हटलें, मला आपल्याबरोबर कांहीं बोलावयाची परवानगी मिळेल का? तो म्हणाला, हेल्लेणी भाषा तुला येते काय? ३८ ज्या मिसऱ्यानें थोड्या दिवसांमागें बंड उठवून त्या चार हजार मारेकऱ्यांस रानांत नेलें तो तूंच आहेस कीं नाहीं? ३९ तेव्हां पौलानें म्हटलें, मी किलिकियांतील तार्सकर यहूदी आहें; हलक्या नगरचा राहणारा नव्हें; मी आपल्याला विनंति करितों कीं लोकांबरोबर बोलण्याची मला परवानगी द्या. ४० त्यानें परवानगी दिल्यावर पौलानें पायऱ्यांवर उभें राहून लोकांस हातानें खुणाविलें; आणि अगदीं निवांत झाल्यावर तो त्यांजबरोबर इब्री भाषेंत येणेंप्रमाणें बोलला:

## यहूद्यांबरोबर पौलानें केलेलें भाषण

२२ १ बंधुजनहो व वडील मंडळहो, मी जें आतां तुम्हांस प्रत्युत्तर करितों तें ऐका.

२ तो आपणांबरोबर इब्री भाषेंत बोलत आहे हें ऐकून ते अधिक स्वस्थ झाले, मग त्यानें म्हटलें:

३ मी यहूदी असून किलिकियांतील तार्स नगरांत माझा जन्म झाला, आणि या नगरांत गमलियेलाच्या चरणांजवळ लहानाचा मोठा होऊन वाडवडिलांच्या नियमशास्त्राचें कडकडीत रीतीनें मला शिक्षण मिळालें, आणि जसे तुम्ही सर्व आज देवाविषयीं उत्कंठित आहां तसाच मी होतों; ४ पुरुष व स्त्रिया यांस बांधून बंदिशाळेंत घालून, देहांत शिक्षा देऊनसुद्धां, या पंथाचा पाठलाग मीं केला. ५ याविषयीं मुख्य याजक व अवघा वडीलवर्गहि माझा साक्षी आहे; त्यांजपासून बंधुजनांस पत्रें घेऊन दिमिष्कास चाललों होतों, यासाठीं कीं जे तेथें होते त्यांसहि बांधून यरुशलेमांत शासन करावयास आणावें. ६ मग असें झालें कीं जातां जातां मी दिमिष्काजवळ पोहंचलों तेव्हां सुमारें दुपारच्या वेळेस आकाशांतून मोठा प्रकाश माझ्याभोवतीं एकाएकीं चमकला. ७ तेव्हां मी भूमीवर पडलों, आणि शौला, शौला, माझा छळ कां करितोस, अशी वाणी मजबरोबर बोलतांना मीं ऐकली. ८ मीं विचारिलें, प्रभुजी, तूं कोण आहेस? त्यानें मला म्हटलें, ज्या नासोरी येशूचा छळ तूं करितोस तोच मी आहें. ९ तेव्हां माझ्याबरोबर जे होते त्यांनीं प्रकाश पाहिला खरा, परंतु मजबरोबर बोलणाऱ्याची वाणी त्यांनीं ऐकली नाहीं. १० मग मी म्हणालों, प्रभुजी, मीं काय करावें? प्रभूनें मला म्हटलें, उठून दिमिष्कांत जा; मग तूं जें जें करावें म्हणून ठरविण्यांत आलें आहे तें सर्व तुला तेथें सांगितलें जाईल. ११ त्या प्रकाशाच्या तेजामुळें मला दिसेनासें झालें म्हणून माझ्या सोबत्यांनीं माझा हात धरून मला दिमिष्कांत नेलें. १२ मग हनन्या नामें कोणीएक मनुष्य होता, तो नियमशास्त्राप्रमाणें धार्मिक आणि तेथें राहणाऱ्या सर्व यहूद्यांकडून नांवलौकिक मिळविलेला असा होता; १३ त्यानें मजकडे येऊन जवळ उभें राहून मला म्हटलें, शौल भाऊ, वर पाहा. तत्क्षणींच मीं त्याजकडे वर पाहिलें. १४ मग तो म्हणाला, आपल्या पूर्वजांच्या देवानें तुजसंबंधानें ठरविलें आहे कीं तूं त्याची इच्छा काय आहे हें समजून घ्यावें, त्या धार्मिक पुरुषाला पाहावें व त्याच्या तोंडची वाणी ऐकावी; १५ कारण जें तूं पाहिलें व ऐकलें त्याविषयीं तूं सर्व मनुष्यांपुढें त्याचा साक्षी होशील. १६ तर आतां उशीर कां करितोस? ऊठ, त्याच्या नामानें धांवा करून बाप्तिस्मा घे, आणि आपल्या पातकांचें क्षालन कर. १७ मग असें झालें कीं मी यरुशलेमास माघारें आल्यावर मंदिरांत प्रार्थना करीत असतां माझें देहभान सुटलें. १८ तेव्हां मीं त्याला पाहिलें; तो मला बोलला: त्वरा कर, यरुशलेमांतून लवकर निघून जा; कारण मजविषयीं तूं दिलेली साक्ष ते मान्य करणार नाहींत. १९ तेव्हां मी म्हणालों, प्रभो, त्यांस ठाऊक आहे कीं तुजवर विश्वास ठेवणाऱ्यांस मी बंदींत टाकून प्रत्येक सभास्थानांत ताडण करीत असें; २० तुझा साक्षी स्तेफन याचा रक्तपात झाला तेव्हां मीं स्वतः जवळ उभा असून मान्यता दर्शविली आणि त्याचा घात करणाऱ्यांचीं वस्त्रें राखीत होतों. २१ तेव्हां त्यानें मला सांगितलें, जा, मी तुला विदेशी लोकांकडे दूर पाठवितों.

### रोमी नागरिक म्हणून असलेला पौलाचा हक्क

२२ या वाक्यापर्यंत लोकांनीं त्याचें ऐकलें; मग ते
आरोळी मारून बोलले, अशाची वाट लावून याला जगां-
तून काढा; हा वांचावयास योग्य नाहीं. २३ ते
ओरडत व आपलीं वस्त्रें अंगावरून काढून टाकून
आकाशांत धूळ उधळीत असतां, २४ सरदारानें असा
हुकूम केला कीं त्याला गढींत आणावें; ते त्याजवर इतके
कां ओरडले हें समजावें म्हणून त्यानें चाबकाखालीं त्याची
चौकशी करण्यास सांगितलें. २५ मग त्यांनीं त्याला
वाद्यांनीं ताणिलें, तेव्हां जवळ उभा असलेल्या जमादाराला
पौलानें म्हटलें, रोमी मनुष्याला, व तशांत ज्याला अन्यायी
ठरविलें नाहीं अशाला, फटके मारणें तुम्हांला कायदेशीर
आहे काय? २६ हें ऐकून जमादारानें सरदाराजवळ
जाऊन म्हटलें, आपण हें काय करीत आहां? तो माणूस
रोमी आहे. २७ तेव्हां सरदार त्याच्याजवळ येऊन
म्हणाला, तूं रोमी आहेस काय? मला सांग. त्यानें म्हटलें,
होय. २८ सरदारानें उत्तर केलें, मीं हा नागरिकपणाचा
हक्क फार मोलानें विकत घेतला आहे. पौलानें म्हटलें, मी
तर जन्मतःच रोमी आहें. २९ यावरून त्याची जे चौकशी
करणार होते ते तात्काळ त्याजपासून गेले. शिवाय हा
रोमी आहे असें सरदाराला कळलें तेव्हां त्यालाहि भीति
वाटली; कारण त्यानें त्याला जखडविलें होतें.

### सन्हेद्रिन सभेपुढें पौलानें केलेलें आत्मसमर्थन

३० यहूदी लोकांनीं त्याजवर जो आरोप आणिला तो
काय आहे हें निश्चितपणें कळावें असें सरदाराच्या मनांत
होतें, म्हणून दुसऱ्या दिवशीं त्यानें त्याला मोकळें केलें,
आणि मुख्य याजक व अवघी धर्मसभा यांस एकत्र
होण्याचा हुकूम करून पौलाला खालीं आणून त्यांजपुढें
उभें केलें.

२३ १ मग पौल धर्मसभेकडे स्थिर दृष्टि करून
म्हणाला, बंधुजनहो, मी आजपर्यंत देवाबरोबर पूर्ण
सद्भावेकरून प्रजाधर्मानें वर्तलों. २ तेव्हां प्रमुख
याजक हनन्या यानें त्याच्याजवळ उभें राहणाऱ्यांस त्याच्या
तोंडांत मारण्याची आज्ञा केली. ३ तेव्हां पौल त्याला
म्हणाला, हे चुना लावलेल्या भिंती, तुला देव मारील; तूं
नियमशास्त्राप्रमाणें माझा न्याय करावयाला बसला असतां
नियमशास्त्राविरुद्ध मला मारण्याची आज्ञा देतोस काय?
४ तेव्हां जवळ उभे राहणारे म्हणाले, देवाच्या प्रमुख
याजकाची तूं निंदा करितोस काय? ५ पौलानें म्हटलें,
बंधुजनहो, हा प्रमुख याजक आहे हें मला ठाऊक नव्हतें;
तूं 'आपल्या लोकांच्या अधिकाऱ्याविरुद्ध वाईट बोलूं
नको' असें लिहिलें आहे. ६ तेव्हां त्यांच्यामध्यें एक
भाग सदूकी व एक भाग परूशी आहे, असें ताडून पौल
धर्मसभेमध्यें मोठ्यानें म्हणाला, बंधुजनहो, मी परूशी
व परूश्यांचा पुत्र आहें; आमची आशा व मेलेल्यांचें पुनः
उठणें यांसंबंधानें माझी चौकशी होत आहे. ७ तो हें
बोलत आहे तोंच परूशी व सदूकी यांचा कलह होऊन
लोकसभेंत फूट पडली. ८ कारण पुनः उठणें होत नाहीं
आणि देवदूत व आत्माहि नाहीं, असें सदूकी म्हणतात;
परूशी तर ह्या दोन्ही गोष्टी मान्य करितात. ९ तेव्हां
मोठा गलबला झाला; आणि जे शास्त्री परूश्यांच्या पक्षाचे
होते त्यांच्यांतून कांहीं उठून भांडत म्हणाले, या मनु-
ष्याच्या ठायीं आम्हांस कांहीं वाईट दिसत नाहीं; जर
आत्मा किंवा देवदूत त्याजबरोबर बोलला असला तर मग
कसें? १० असा त्यांचा मोठा कलह चालला असतां ते
पौलाला फाडून टाकतील असें भय वाटून सरदारानें
शिपायांस हुकूम केला कीं खालीं जाऊन त्याला त्यांजमधून
सोडवून गढींत आणावें.

११ त्याच रात्रीं प्रभु त्याजपुढें उभा राहून म्हणाला,
धीर धर; जशी तूं यरुशलेमांत मजविषयींची साक्ष दिली
तशी रोम येथेंहि तुला द्यावी लागेल.

### पौलाच्याविरुद्ध यहूद्यांचा कट

१२ मग दिवस उगवल्यावर, कित्येक यहूदी कट करून
स्वतःस शपथेनें बद्ध करून घेऊन म्हणाले, आपण पौलाचा
जीव घेईपर्यंत खाणारपिणार नाहीं. १३ हा कट करणारे
इसम चाळिसांहून अधिक होते. १४ ते मुख्य याजक व
वडीलमंडळ यांजकडे येऊन म्हणाले, पौलाचा जीव घेई-
पर्यंत आम्ही अन्नाला शिवणार नाहीं, अशा कडकडीत
शपथेनें आम्हीं आपणांस बद्ध करून घेतलें आहे. १५ तर
आतां त्याजविषयीं आणखी कांहीं बारकाईनें विचारपूस

करावयाची आहे, या निमित्तानें त्याला आपणाकडे आणावें असें तुम्हीं सभेसहित सरदाराला समजवावें; म्हणजे तो जवळ आला न आला तोंच त्याचा जीव घेण्यास आम्ही तयार आहों. १६ ते दबा धरून बसल्याचें पौलाच्या भाच्यानें ऐकलें, आणि गढींत जाऊन त्यानें पौलाला तें सांगितलें. १७ तेव्हां पौलानें एका जमादाराला बोलावून म्हटलें, या तरुणाला सरदाराकडे घेऊन जावें; याला त्यास कांहीं सांगावयाचें आहे. १८ तेव्हां त्यानें त्याला सरदाराकडे नेऊन म्हटलें, बंदिवान पौल यानें मला बोलावून विनंति केली कीं या तरुणाला आपणाकडे आणावें, त्याला आपणाबरोबर कांहीं बोलावयाचें आहे. १९ तेव्हां सरदारानें त्याचा हात धरून त्याला एकीकडे नेऊन विचारिलें, मला सांगावयाचें आहे तें काय? २० तो म्हणाला, यहूद्यांनीं असा एकोपा केला आहे कीं पौलाविषयीं आणखी कांहीं बारकाईनें विचारपूस करावयाच्या निमित्तानें त्याला उद्यां खालीं सभेमध्यें आणावें, अशी आपणाकडे विनंति करावी. २१ तर आपण त्यांचें ऐकूं नये; कारण त्यांच्यापैकीं चाळिसांहून अधिक माणसें त्याच्यासाठीं दबा धरून बसलीं आहेत; त्यांनीं शपथ घेतली आहे कीं त्याला जिवें मारीपर्यंत आपण खाणारपिणार नाहीं; आणि आतां ते तयार होऊन आपली कबुली मिळण्याची वाट पाहत आहेत. २२ तेव्हां तूं हें मला कळविलें हें कोणाला सांगूं नको, असें सरदारानें त्या तरुणाला बजावून सांगून त्याला निरोप दिला.

## कैसरीया येथें पौलाला पाठवितात

२३ मग त्यानें दोघां जमादारांस बोलावून सांगितलें, कैसरीया एथें जावयाला दोनशें शिपाई, सत्तर स्वार व दोनशें भालेकरी असे प्रहर रात्रीस तयार करून ठेवा; २४ आणि पौलाला बसवून फेलिक्स सुभेदाराकडे संभाळून नेण्याकरितां पाठळें मिळवा. २५ शिवाय त्यानें अशा मजकुराचें पत्र लिहिलें:

२६ नामदार फेलिक्स सुभेदार यांस क्लौद लुसिया याचा सलाम. २७ ह्या मनुष्यास यहूद्यांनीं धरिलें होतें आणि त्याचा घात त्यांजकडून होणार होता, इतक्यांत हा रोमी आहे, असें कळल्यावरून मीं शिपाई घेऊन जाऊन त्याला सोडविलें; २८ आणि याजवर आरोप आणल्याचें काय कारण होतें हें समजून घेण्याच्या इच्छेनें त्याला त्यांच्या धर्मसभेंत खालीं नेलें; २९ तेव्हां त्यांच्या नियमशास्त्रांतील वादग्रस्त गोष्टींसंबंधीं त्याजवर कांहीं ठपका आणिला होता, परंतु मरणाची किंवा बंधनांची शिक्षा देण्याजोगा असा त्याजवर आरोप नव्हता, असें दिसून आलें. ३० या माणसाविरुद्ध कट होणार आहे अशी मला खबर लागतांच मीं त्याला आपल्याकडे पाठविलें आहे, वाद्यांसहि आपल्यासमोर खटला चालविण्यास सांगितलें आहे. [ सुखरूप असावें. ]

३१ शिपायांनीं हुकुमाप्रमाणें पौलाला रात्रीस अंतिपत्रिसास नेलें; ३२ आणि दुसऱ्या दिवशीं त्याजबरोबर जाण्यास स्वार ठेवून ते गढींत परत आले. ३३ स्वारांनीं कैसरीयांत जाऊन सुभेदाराला पत्र देऊन पौलालाहि त्याजपुढें उभें केलें. ३४ त्यानें पत्र वाचून विचारलें, हा कोणत्या प्रांताचा आहे? तो किलिकियाचा आहे असें समजल्यावर, ३५ त्यानें म्हटलें, तुझे वादी आले म्हणजे मी तुझें ऐकेन; आणि त्यानें त्याला हेरोदाच्या वाड्यांत ठेवावें असा हुकूम सोडिला.

## फेलिक्स सुभेदारासमोर पौलाची चौकशी

२४ १ पांच दिवसांनंतर प्रमुख याजक हनन्या कांहीं वडीलमंडळ आणि तिर्तुल्ल नामें कोणीएक वकील यांस घेऊन खालीं आला; आणि त्यांनीं सुभेदाराला पौलाविरुद्ध मजकूर कळविला. २ त्याला बोलविल्यावर तिर्तुल्ल त्याजवर दोषारोप करूं लागला, तो येणेंप्रमाणें:

नामदार फेलिक्स महाराज, आपल्यामुळें आम्हांस फार स्वस्थता मिळाली आहे, आणि आपल्या दूरदर्शीपणानें या राष्ट्रांत सुधारणा होत आहे; ३ यास्तव तिचा आम्ही पूर्ण कृतज्ञतेनें, सर्व प्रकारें व सर्वत्र आदर करितों. ४ तरी आपला अधिक खोळंबा करूं नये म्हणून विनंति करितों कीं मेहरबानीनें आमचें थोडक्यांत ऐकावें. ५ हा माणूस केवळ पीडा असा आम्हांस आढळला आहे, आणि जगांतल्या सर्व यहूदी

लोकांत बंड उठविणारा असून नासोरी लोकांच्या
पंथाचा पुढारी आहे; ६ त्यानें मंदिरहि विटाळविण्याचा
प्रयत्न केला; त्याला आम्हीं धरिलें; ( व आमच्या
नियमशास्त्राप्रमाणें याचा न्याय ठरविण्यास पाहत होतों;
७ पण लुसिया सरदारानें येऊन, मोठ्या जबरदस्तीनें
याला आमच्या हातांतून काढून नेलें; ८ आणि याच्या
वाद्यांस आपणाकडे येण्याची आज्ञा केली; ) याची
आपण चौकशी कराल तर ज्या गोष्टींचा दोषारोप
आम्ही त्याजवर करितों, त्या सर्वांविषयीं त्याजकडूनच
आपणाला समजेल, ९ तेव्हां या गोष्टी अशाच आहेत,
असें बोलून यहूद्यांनींहि पुष्टीकरण दिलें.

१० मग सुभेदारानें बोलण्यास खुणाविल्यावर पौलानें
उत्तर दिलें:

आपण बहुत वर्षें या लोकांचे न्यायाधीश आहां
हें मला ठाऊक आहे, म्हणून मी आपल्या गोष्टी-
विषयीं संतोषानें प्रत्युत्तर देतों. ११ आपणास सहज
समजेल कीं मला यरुशलेमांत भजन करावयास जाऊन
अजून बारांपेक्षां अधिक दिवस झाले नाहींत; १२
आणि मंदिरांत, सभास्थानांत किंवा नगरांत कोणाबरो-
बर वादविवाद करितांना किंवा लोकांत बंडाळी माज-
वितांना मी त्यांस आढळलों नाहीं. १३ ज्या गोष्टींचा
दोषारोप ते मजवर आतां करीत आहेत, त्यांची
आपणापुढें त्यांस शाबिती करितां येत नाहीं. १४
तरी इतकें आपणाजवळ कबूल करितों कीं ज्या
मार्गाला ते विपथ म्हणतात त्या मार्गाप्रमाणें जें जें
नियमशास्त्रानुसार आहे व जें जें संदेष्टलेखांत आहे
त्या सर्वांवर विश्वास ठेवून मी आमच्या पूर्वजांच्या
देवाची सेवा करितों; १५ आणि धार्मिकांचें व अधा-
र्मिकांचेंहि पुनः उठणें होईल, अशी जी ते आशा
धरितात तीच आशा मी देवाकडे पाहून धरितों. १६
यामुळें देवासंबंधानें व मनुष्यासंबंधानें माझें मन
सतत शुद्ध राखण्याचा मी यत्न करितों. १७ मी
पुष्कळ वर्षांनीं आपल्या लोकांत दानधर्म करावयास व
अर्पणें वाहावयास आलों; १८ हीं करीत असतां मी
व्रतस्थ असा मंदिरांत आढळलों, माझ्याबरोबर लोकांचा
घोळका नव्हता, अगर दंगल होत नव्हता; तरी तेथें
आसियाचे कित्येक यहूदी होते; १९ त्यांचें माझ्या-
विरुद्ध कांहीं होतें तर त्यांनीं आपणापुढें येऊन मजवर
दोषारोप करावयाचा असता; २० किंवा यांनीं तरी सांगावें
कीं मी धर्मसभेपुढें उभा राहिलों असतां माझा कोणता
अपराध यांस दिसून आला. २१ यांच्यामध्यें उभें
राहून, मेलेल्यांच्या पुनः उठण्याविषयीं माझा न्याय
आज तुम्हांपुढें होत आहे, हे शब्द मी मोठ्यानें
बोललों; हा माझा उद्गार अपराध असला तर असेल.

## फेलिक्स खटल्याचें काम तहकूब करतो

२२ फेलिक्साला त्या मार्गाची चांगली माहिती असल्या-
मुळें त्यानें खटला तहकूब करून म्हटलें, लुसिया सरदार
येईल तेव्हां तुमच्या प्रकरणाचा निकाल करीन; २३
आणि त्यानें जमादाराला हुकूम केला कीं याजवर रख-
वाली ठेवावी; तरी याला मोकळीक असावी; आणि
याच्या स्वकीयांस याची सेवा करण्याविषयीं मनाई नसावी.

२४ मग कांहीं दिवसांनंतर फेलिक्स आपली यहूदीण
बायको द्रुसिल्ला इच्यासहित आला, व त्यानें पौलाला
बोलावून ख्रिस्त येशूवरील विश्वासाविषयीं त्याजपासून
ऐकून घेतलें. २५ तेव्हां धार्मिकता, इंद्रियदमन व भावी
न्याय यांविषयीं तो भाषण करीत असतां, फेलिक्सानें
भयभीत होऊन म्हटलें, आतां तूं जा; संधि सांपडली
म्हणजे तुला बोलावीन. २६ आणखी आपणास पौलाकडून
द्रव्य मिळेल अशी आशाहि त्यानें धरिली. यास्तव त्याला
पुनः पुनः बोलावून आणून तो त्याच्याबरोबर संभाषण
करीत असे. २७ पुढें दोन वर्षांनंतर फेलिक्साच्या जागेवर
पुर्क्य फेस्त हा आला; तेव्हां यहूद्यांची मर्जी संपादण्याच्या
इच्छेनें फेलिक्स पौलाला कैदेंतच ठेवून गेला.

## फेस्तासमोर पौलाची चौकशी

२५ १ मग फेस्त सुभ्यांत येऊन तीन दिवसांनीं
कैसरीयाहून यरुशलेमास वर गेला. २ तेव्हां
प्रमुख याजक व यहूद्यांतील मुख्य पुरुष यांनीं
त्याजकडे पौलावर फिर्याद केली; ३ आणि, मेहरबानी
करून त्याला यरुशलेमांत बोलावून घ्यावें, अशी त्याकडे
विनंति केली; ते वाटेंत त्याचा घात करण्याकरितां दबा

धरण्याच्या व्यवस्थेंत होते. ४ फेस्तानें उत्तर दिलें, पौल कैसरीयांत कैदेंत आहे, मी स्वतः तिकडे लवकरच जाणार आहें; ५ म्हणून त्या मनुष्याचा कांहीं अपराध असला तर तुम्हांतील प्रमुखांनीं माझ्याबरोबर येऊन त्याजवर आरोप ठेवावा.

६ मग तो त्यांजमध्यें आठदहा दिवस राहून कैसरीयास खालीं गेला; आणि दुसऱ्या दिवशीं न्यायासनावर बसल्यावर त्यानें पौलाला आणावयाचा हुकूम केला. ७ तो आल्यावर यरुशलेमाहून आलेले यहूदी यांनीं त्याच्यासभोवतें उभे राहून ज्यांचा पुरावा त्यांच्यानें करवेना असे पुष्कळ व भयंकर आरोप त्याजवर ठेविले; ८ पौलानें प्रत्युत्तर केलें कीं मीं यहूद्यांच्या नियमशास्त्राचा, मंदिराचा किंवा कैसराचा कांहीं अपराध केला नाहीं. ९ तेव्हां यहूद्यांची मर्जी संपादावी अशा इच्छेनें फेस्त पौलाला म्हणाला, यरुशलेमास जाऊन तेथें माझ्यापुढें या गोष्टींविषयीं तुझा न्याय व्हावा अशी तुझी इच्छा आहे काय? १० तेव्हां पौलानें म्हटलें, कैसराच्या न्यायासनापुढें मी उभा आहें, एथेंच माझा न्याय व्हावा; मीं यहूद्यांचा कांहीं अन्याय केला नाहीं, हें आपणहि चांगलें ओळखतां. ११ मीं अन्याय केला असला किंवा मरणास योग्य असें कांहीं केलें असलें तर मी मरावयास अमान्य नाहीं; परंतु ते मजवर जे आरोप आणितात, त्यांत जर एकहि खरा ठरत नाहीं, तर त्यांच्या स्वाधीन मला करण्याचा कोणाला अधिकार नाहीं; मी कैसराजवळ न्याय मागतों. १२ तेव्हां फेस्तानें सभेची मसलत घेऊन उत्तर दिलें, कैसराजवळ न्याय मागितला आहेस, तर तूं कैसरापुढें जाशील.

## अग्रिप्पा व बर्णीका

१३ मग कांहीं दिवस झाल्यावर अग्रिप्पा राजा व बर्णीका हीं कैसरीयास येऊन फेस्ताला भेटलीं. १४ तेथें तीं पुष्कळ दिवस राहिलीं; तेव्हां फेस्तानें राजापुढें पौलाचें प्रकरण काढून म्हटलें, फेलिक्सानें बंदींत ठेविलेला असा एक मनुष्य एथें आहे; १५ मी यरुशलेमास गेलों तेव्हां त्याजवर यहूद्यांच्या मुख्य याजकांनीं व वडील मंडळींनीं फिर्याद करून त्याजविरुद्ध ठराव व्हावा म्हणून विनंति केली. १६ त्यांस मीं उत्तर दिलें कीं आरोपी व वादी हे समोरासमोर येऊन, आरोपाविषयीं प्रत्युत्तर देण्याचा आरोपीला प्रसंग मिळण्यापूर्वी कोणत्याहि माणसाला दंडाकरितां सोपून द्यावें अशी रोमी लोकांची रीत नाहीं. १७ यास्तव ते येथें आल्यावर कांहीं उशीर न करितां, दुसऱ्या दिवशीं न्यायासनावर बसून मीं त्या मनुष्याला आणावयाचा हुकूम केला. १८ वादी उभे असतां ज्या वाईट गोष्टींचा त्याजविषयीं माझ्या मनांत संशय आला होता त्यांचा आरोप त्यांनीं त्याजवर ठेविला नाहीं; १९ केवळ त्यांच्या धर्माविषयीं व जो जीवंत आहे म्हणून पौल म्हणतो असा कोणी मृत झालेला येशू याजविषयीं ह्याचा व त्यांचा वाद होता. २० तेव्हां ह्याची चौकशी कशी चालवावी हें मला सुचेनासें झाल्यामुळें मीं त्याला विचारिलें, यरुशलेमास जाऊन तेथें या गोष्टीविषयीं तुझा न्याय व्हावा अशी तुझी इच्छा आहे काय? २१ तेव्हां बादशहाच्या निकालासाठीं मला ठेवावें अशी पौलानें मागणी केल्यावरून मीं हुकूम केला कीं याला कैसराकडे पाठवीपर्यंत कैदेंत ठेवावें. २२ अग्रिप्पा फेस्ताला म्हणाला, त्या माणसाचें ऐकावें असें माझ्याहि मनांत आहे. त्यानें उत्तर दिलें, उद्यां त्याचें ऐकावयास आपल्याला मिळेल.

२३ दुसऱ्या दिवशीं अग्रिप्पा व बर्णीका हीं मोठ्या थाटानें येऊन सरदार व नगरांतील मुख्य लोक यांच्यासुद्धां दरबारांत गेलीं, आणि फेस्तानें हुकूम दिल्यावर पौलाला तेथें आणिलें. २४ तेव्हां फेस्त म्हणाला, अग्रिप्पा महाराज, व आम्हांबरोबर असणारे सर्व जनहो, या माणसाला तुम्ही पाहतां ना? ह्यानें ह्यापुढें जीवंत राहूं नये असें ओरडत यहूद्यांच्या सर्व समुदायानें यरुशलेमास व एथेंहि मला अर्ज केला; २५ परंतु त्यानें मरणास योग्य असें कांहीं केलें नाहीं असें मला समजलें, आणि त्यानें स्वतः बादशहाजवळ न्याय मागितला, म्हणून त्याला पाठवावयाचा मीं निश्चय केला. २६ याविषयीं मीं आपल्या स्वामीला काय लिहावें असें कांहीं निश्चित नाहीं, म्हणून तुमच्यापुढें व विशेषेंकरून अग्रिप्पा महाराज, आपणापुढें याला आणिलें आहे; यासाठीं कीं चौकशी झाली म्हणजे मला कांहीं तरी लिहावयास सांपडेल. २७ बंदिवानास पाठवितांना त्याज-

वरील दोषारोप न कळविणें हें मला ठीक दिसत नाहीं.

## अग्रिप्पापुढें पौलानें केलेलें भाषण

२६ १ मग अग्रिप्पानें पौलाला म्हटलें, तुला
स्वतःच्या तर्फे बोलावयास परवानगी आहे. तेव्हां
पौलानें हात पुढें करून प्रत्युत्तर केलें:
२, ३ अग्रिप्पा महाराज, यहूद्यांच्या चालीरिती,
त्यांच्या वादविषयक बाबी व धर्मविचार यांत आपण
विशेष जाणते आहां, आणि आपणापुढें, यहूदी ज्या-
विषयीं मजवर दोषारोप ठेवितात त्या सर्वांविषयीं मला
आज प्रत्युत्तर द्यावयाचें आहे, यावरून मी आपणाला
भाग्यवान् समजतों; आणि मी आपल्याला विनंति करितों
कीं शांतपणें माझें ऐकून घ्या. ४ तरुणपणासून म्हणजे
अगदीं पहिल्यापासून माझ्या लोकांत व यरुशलेमांत माझें
वर्तन कसें होतें तें सर्व यहूद्यांस माहीत आहे. ५ ते
पहिल्यापासून मला ओळखतात; म्हणून त्यांची मर्जी
असल्यास ते साक्ष देतील कीं आमच्या धर्माच्या कड-
कडीत पंथाप्रमाणें मी परूशी होतों. ६ आतां देवानें
आमच्या पूर्वजांस जें वचन दिलें, त्याची आशा धरल्या-
बद्दल माझा न्याय होण्याकरितां मी उभा आहें; ७ तें
वचन प्राप्त होण्याची आशा बाळगून आमचे बारा वंश,
देवाची सेवा रात्रंदिवस एकाग्रतेनें करीत आहेत. हे राजा,
तीच आशा बाळगल्याबद्दल मजवर यहूद्यांनीं आरोप
ठेविला आहे. ८ जर देव मेलेल्यांस उठवितो तर हें तुम्ही
अविश्वसनीय कां ठरवितां? ९ मलाहि वाटत असे कीं
नासोरी येशूच्या नामाविरुद्ध पुष्कळ कार्य करावें; १०
आणि तसें मीं यरुशलेमांत केलेंहि; मुख्य याजकांपासून
अधिकार मिळवून पुष्कळ पवित्र जनांना बंदिशाळांत
कोंडून टाकिलें, आणि त्यांचा घात करण्यास मी संमति
दिली. ११ प्रत्येक सभास्थानांत त्यांस वारंवार शासन
करून त्यांस दुर्भाषण करण्यास लावण्याचा प्रयत्न मी करीत
असें; त्यांजवर अतिशय पिसाळून जाऊन बाहेरच्या नगरां-
पर्यंत देखील मी त्यांचा पाठलाग करीत असें. १२ माझा
असा क्रम चालू असतां, मुख्य याजकांच्या अधिकारानें व
त्यांचा परवाना काढून, मी दिमिष्काकडे चाललों होतों;
१३ तेव्हां, हे राजा, वाटेवर दोन प्रहरीं सूर्याच्या तेजा-
पेक्षां प्रखर असा आकाशाचा प्रकाश माझ्या व मजबरोबर
चालणाऱ्या इसमांच्या सभोंवतीं चकाकतांना मीं पाहिला.
१४ तेव्हां आम्ही सर्व भूमीवर पडलों, इतक्यांत इब्री
भाषेंत मजबरोबर बोलतांना अशी वाणी मीं ऐकली कीं,
शौला, शौला, माझा छळ कां करितोस? पराणीवर लाथ
मारणें हें तुला कठीण. १५ मीं म्हटलें, प्रभो, तूं कोण
आहेस? प्रभु म्हणाला, ज्या येशूचा तूं छळ करितोस तोच
मी आहें. १६, १७ तर उठून उभा राहा; तूं जें मला
पाहिलें त्याविषयीं, आणि या लोकांपासून व विदेशी लोकां-
पासून तुझें रक्षण करितांना तुला जें दर्शन देईन
त्याविषयीं सेवक व साक्षी नेमावें यासाठीं मीं तुला दर्शन
दिलें आहे; १८ त्यांजकडे मी तुला पाठवितों, यासाठीं
कीं त्यांनीं अंधारांतून उजेडाकडे व सैतानाच्या अधिकारां-
तून देवाकडे वळावें, म्हणून तूं त्यांचे डोळे उघडावे,
आणि त्यांना पापांची क्षमा व्हावी व मजवरल्या विश्वासानें
पवित्र झालेल्या लोकांमध्यें वतन मिळावें. १९ यास्तव
हे राजा अग्रिप्पा, मीं तो स्वर्गीय दृष्टांत अवमानिला
नाहीं; २० तर पहिल्यानें दिमिष्कांत व यरुशलेमांत,
अवघ्या यहुदीया देशांत व विदेशी लोकांत उपदेश केला
कीं पश्चात्ताप करा, आणि पश्चात्तापास शोभतील अशीं कर्में
करून देवाकडे वळा. २१ या कारणामुळें यहूदी मला
मंदिरांत धरून वधावयाला पाहत होते. २२ तथापि देवा-
पासून साहाय्य प्राप्त झाल्यामुळें मी लहानमोठ्यांस आज-
पर्यंत साक्ष देत राहिलों आहें; आणि ज्या गोष्टी होणार
आहेत म्हणून संदेष्ट्यांनीं व मोशानें सांगितलें त्यांखेरीज
मीं दुसरें कांहीं सांगितलें नाहीं; २३ त्या अशा कीं ख्रिस्तानें
दुःख सोसणारें असावें आणि मेलेल्यांतून उठणारांपैकीं
पहिले असून त्यानें आमच्या लोकांस व विदेशी लोकांस
प्रकाश प्रकट करावा.

२४ याप्रमाणें तो प्रत्युत्तर करीत असतां, फेस्त
मोठ्यानें बोलला, पौला, तूं वेडा आहेस; विद्येचें अध्ययन
फार झाल्यामुळें तुझें डोकें फिरूं लागलें आहे. २५ पौल
म्हणाला, फेस्त महाराज, मी वेडा नाहीं; खरेपणाच्या व
सुज्ञपणाच्या गोष्टी बोलतों. २६ या गोष्टी महाराजांना
ठाऊक आहेत; आपणासमोर मी प्रशस्तपणें बोलतों;

यांतलें आपणापासून कांहीं गुप्त राहिलें नाहीं अशी माझी खातरी आहे; कां तर हें कोनाकोपऱ्यांत घडलेलें नाहीं. २७ हे राजा अग्रिप्पा, संदेष्ट्यांवर आपला विश्वास आहे ना? विश्वास आहे, हें मला ठाऊक आहे. २८ तेव्हां अग्रिप्पानें पौलाला म्हटलें, मी ख्रिस्ती व्हावें म्हणून तूं थोडक्यानेंच माझें मन वळवितोस. २९ पौल म्हणाला, थोडकें अगर फार, कसेंहि असो; पण केवळ आपणच नव्हे, तर आज हे जे सर्व माझें ऐकत आहेत त्यांनीं या बंधनांशिवाय माझ्यासारिखें व्हावें, अशी देवाजवळ माझी प्रार्थना आहे.

३० तेव्हां राजा, सुभेदार, बर्णीका व त्यांजबरोबर जे बसले होते ते उठले ३१ आणि एकीकडे जाऊन एकमेकांत म्हणाले, या माणसानें मरणास किंवा बंधनास योग्य असें कांहीं केलें नाहीं. ३२ तेव्हां अग्रिप्पानें फेस्ताला म्हटलें, जर या माणसानें कैसराजवळ न्याय मागितला नसता तर याला मोकळें करितां आलें असतें.

## पौलाचा रोमपर्यंतचा जलप्रवास : क्रेतापर्यंत

२७ १ नंतर आम्हीं इटालि देशास तारवांतून जावें असें ठरल्यावर, पौलाला व दुसऱ्या कित्येक बंदिवानांस बादशाही पलटणाचा यूल्य नांवाचा जमादार याच्या स्वाधीन करण्यांत आलें. २ तेव्हां आम्ही, आसियाच्या किनाऱ्यावरील बंदरें करणाऱ्या अद्रमुत्तीय नगरच्या एका तारवांत बसून निघालों; तेव्हां मासेदोनियांतील थेस्सलनीकाचा अरिस्तार्ख हा एक इसम आमच्याबरोबर होता. ३ दुसऱ्या दिवशीं आम्ही सीदोनास पोहंचलों, तेव्हां यूल्यानें पौलाबरोबर मेहेरबानीनें वागून त्याच्या मित्रांनीं त्याचा पाहुणचार करावा म्हणून त्यांजकडे जाण्यास त्याला परवानगी दिली. ४ मग आम्ही तेथून निघाल्यावर वारा समोरचा असल्यामुळें कुप्राच्या किनाऱ्यावरून गेलों. ५ नंतर किलिकिया व पंफुल्या यांच्यासमोरच्या समुद्रावरून जाऊन आम्ही लुक्या प्रांतांतील मुर्या बंदरास पोहंचलों. ६ तेथें इटालीस जाणारें असें एक आलेक्सांद्रियाचें तारूं जमादाराला मिळालें, त्यावर त्यानें आम्हांस चढविलें. ७ मग पुष्कळ दिवस हळूहळू जातां जातां मोठ्या कष्टानें कनिदासमोर आल्यावर वारा पुढें जाऊं देईना, म्हणून आम्ही क्रेतावरून सल्मोनासमोर गेलों; ८ मग आम्ही मोठ्या कष्टानें त्याच्या काठाकाठानें सुंदर नांवाच्या बंदरीं आलों; त्याजवळ लसया नगर होतें.

## मिलितापर्यंत : तुफान व नौकाभंग

९ तेव्हां फार दिवस झाल्यामुळें आणि तितक्यांत उपासाचे दिवसहि होऊन गेल्यामुळें त्या वेळेस समुद्रावरून जाणें संकटाचें होतें, म्हणून पौलानें त्यांस अशी सूचना दिली कीं, १० अहो गृहस्थांनो, ह्या जलप्रवासांत केवळ मालाचें आणि तारवाचें नव्हे, तर आपल्या प्राणांचेंहि नुकसान व मोठी हानि होईल असें मला दिसतें. ११ तथापि जमादारानें पौलाच्या सूचनेपेक्षां तांडेल व तारवाचा धनी यांजकडे अधिक लक्ष दिलें. १२ तें बंदर हिंवाळ्यांत राहावयाला सोईचें नव्हतें म्हणून बहुतेकांनीं मसलत दिली कीं तेथून निघावें, आणि साधेल तर क्रेतांतील फैनिके बंदरांत जाऊन तेथें हिंवाळा घालवावा; हें नैर्ऋत्याभिमुख व वायव्याभिमुख आहे. १३ मग दक्षिण वारा मंद वाहत असल्यामुळें आपला बेत सिद्धीस गेलाच असें समजून, ते तेथून नांगर उचलून काठाकाठानें क्रेताच्या बाजूनें गेले; १४ परंतु थोड्या वेळानंतर युरकुलोन नांवाचा तुफानी वारा तिकडून सुटला; १५ त्यांत तारूं सांपडून वाऱ्याच्या तोंडीं ठरेना, म्हणून आम्ही त्याच्या स्वाधीन होऊन वाहवत चाललों. १६ मग कौदा नांवाच्या एका लहान बेटावरून जातांना आम्हीं मोठ्या प्रयासानें होडी आपल्या स्वाधीन करून घेतली; १७ ती वर घेतल्यावर त्यांनीं साहित्याची योजना करून तारूं खालून आवळून बांधिलें; आणि तें सुर्ती नांवाच्या भाटीवर लागेल असें त्यांस भय वाटलें म्हणून त्यांनीं शीड उतरलें, मग ते तसेच वहावत गेले. १८ तेव्हां वादळानें आमचे फार हाल होऊं लागल्यामुळें, ते दुसऱ्या दिवशीं भरत टाकूं लागले; १९ आणि तिसऱ्या दिवशीं त्यांनीं

आपल्या हातांनीं तारवाचें अवजार टाकून दिलें. २० मग पुष्कळ दिवस सूर्य व तारेहि दिसले नाहींत, आणि तुफानाचा जोर आम्हांला फारच भासला, त्यामुळें शेवटीं आमची तरण्याची आशा अगदीं नाहींशी झाली. २१ त्यांस पुष्कळ दिवस उपास पडल्यावर पौल त्यांजमध्यें उभा राहून म्हणाला, गृहस्थहो, तुम्हीं माझें ऐकावयाचें होतें, क्रेताहून निघावयाचें नव्हतें, म्हणजे हे हाल व ही हानि टळली असती. २२ तर मी आतां तुम्हांस सांगतों कीं धैर्य धरा; तुम्हांतील कोणाच्याहि जीवाचा नाश होणार नाहीं. तारवाचा मात्र होईल; २३ कारण ज्याचा मी आहें व ज्याची सेवा मी करितों त्या देवाचा दूत गेल्या रात्रीं माझ्याजवळ उभा राहून म्हणाला, २४ पौला, भिऊं नको; तुला कैसरापुढें उभें राहिलें पाहिजे; आणि पाहा, तुजबरोबर जे तारवांतून चालले आहेत ते अवघे देवानें तुला दिले आहेत. २५ यास्तव गृहस्थांनो, धैर्य धरा; माझा देवावर भरवसा आहे कीं जसें मला त्यानें कळविलें तसेंच घडेल. २६ तथापि आपल्याला एका बेटावर पडावें लागेल.

२७ नंतर चौदाव्या रात्रीस अद्रिया समुद्रांत आम्ही इकडे तिकडे हेलकावे खात असतां मध्यरात्रीच्या सुमारास खलाश्यांनीं अनुमान केलें कीं आपण एखाद्या किनाऱ्याजवळ येत आहों; २८ तेव्हां त्यांनीं बुडीद टाकिलें तेव्हां वीस वावें पाणी भरलें; कांहीं पुढें जाऊन पुनः बुडीद टाकलें तेव्हां पंधरा वावें भरलें. २९ तेव्हां आपण कदाचित् खडकाळ जागेवर आपटूं असें भय वाटल्यामुळें वरामावरून चार नांगर सोडून ते उत्कंठेनें दिवसाची वाट पाहत बसले. ३० मग नांगर नाळीवरूनहि टाकावे या निमित्तानें खलाशी समुद्रांत होडी सोडून तारवांतून पळावयास पाहत होते; ३१ तेव्हां पौल जमादाराला व शिपायांला म्हणाला, हे तारवांत न राहिले तर तुमचें रक्षण व्हावयाचें नाहीं. ३२ तेव्हां शिपायांनीं होडीचे दोर कापून ती पडूं दिली. ३३ नंतर दिवस उगवण्याच्या सुमारास पौल सर्वांस अन्न खाण्याविषयीं विनंति करून म्हणाला, आज चवदा दिवस तुम्ही वाट पाहत उपाशीं राहिलां आहां, कांहीं खाल्लें नाहीं. ३४ यास्तव मी विनंति करितों कीं अन्न खा; त्याच्यानें तुमचा निभाव लागेल; तुम्हांतील कोणाच्या डोक्याच्या केसाचाहि नाश होणार नाहीं. ३५ असें म्हणून त्यानें भाकर घेऊन त्या सर्वांसमक्ष देवाचे आभार मानिले, आणि ती मोडून तो खाऊं लागला. ३६ मग त्या सर्वांस धीर येऊन त्यांनींहि अन्न खाल्लें. ३७ त्या तारवांत आम्ही सर्व मिळून दोनशें शाहत्तर जण होतों. ३८ जेवून तृप्त झाल्यावर त्यांनीं समुद्रांत गहूं टाकून देऊन तारूं हलकें केलें. ३९ दिवस उगवल्यावरहि ती भूमि कोणती हें त्यांनीं ओळखलें नाहीं; पण एक खाडी व तिचा सपाट किनारा त्यांच्या दृष्टीस पडला, आणि साधेल तर त्यावर तारूं लावावें असा त्यांनीं विचार केला. ४० मग नांगर कापून टाकून त्यांनीं ते समुद्रांत राहूं दिले, त्याच वेळेस सुकाणाचीं बंधनें ढिलीं केलीं; आणि पुढचें शीड वाऱ्यावर सोडून सपाटीची वाट धरिली. ४१ मग समुद्रांत वर आलेल्या जमिनीस तारूं लागल्यावर त्यांनीं तें पुढें घुसविलें; तेव्हां नाळ रुतून गच्च बसली, आणि वराम लाटांच्या जोरानें फुटून गेलें. ४२ तेव्हां कोणीं बंदिवानांनीं पोहून पळून जाऊं नये म्हणून त्यांस मारून टाकावें अशी शिपायांनीं मसलत केली, ४३ तथापि पौलाला वांचवावें अशा इच्छेनें त्यांच्या बेतास जमादार आडवा आला; आणि त्यानें हुकूम दिला कीं ज्यांस पोहतां येत असेल त्यांनीं पहिल्यानें उडी टाकून काठास जावें; ४४ आणि बाकीच्यांनीं कोणीं फळ्यांवर व कोणीं तारवावरील दुसऱ्या कशावर बसून जावें. याप्रमाणें सर्व जण काठास सुरक्षित पोहंचले.

## मिलिता येथें पौल

२८ १ असें आम्ही निभावल्यावर त्या बेटाचें नांव मिलिता आहे असें आम्हांस समजलें. २ तेथील बर्बर लोकांनीं आम्हांवर विशेष उपकार केले; म्हणजे पाऊस व गारठा असल्यामुळें त्यांनीं शेकोटी पेटवून आम्हां सर्वांचा पाहुणचार केला. ३ तेव्हां पौलानें काटक्यांची मोळी आणून शेकोटीवर घातली, इतक्यांत उष्णता झाल्यामुळें एक साप बाहेर निघून त्याच्या हातास झोंबून राहिला. ४ तें जिवाणू त्याच्या हाताला लटकलेलें पाहून, बर्बर लोक एकमेकांस म्हणाले, हा माणूस घातक

आहे, हा समुद्रांतून वांचला तरी न्यायदेवता त्याला वांचूं देत
नाहीं. ५ त्यानें तर तें जिवाणू विस्तवांत झटकून टाकिलें आणि
त्याला कांहीं इजा झाली नाहीं. ६ तो सुजेल अगर एका-
एकीं मरून पडेल ह्याची त्यांनीं वाट पाहिली; ह्याची
फार वेळ वाट पाहिल्यावर त्याला कांहीं विकार झाला
नाहीं, असें पाहून ते आपलें मत बदलून म्हणाले, हा कोणी
देव आहे.

७ तिकडे पुब्ल्य नामें त्या बेटाच्या मुख्य अधि-
काऱ्याच्या जमिनी आसपास होत्या; त्यानें आमचें
आगतस्वागत करून तीन दिवस आदरानें पाहुणचार केला.
८ तेव्हां असें झालें कीं पुब्ल्याचा बाप तापानें व आंव-
रक्तानें दुखणाईत पडला होता; त्याजकडे आंत जाऊन
पौलानें प्रार्थना केली व त्याजवर हात ठेवून त्याला बरें
केलें. ९ हें झाल्यावर त्या बेटामध्यें ज्या दुसऱ्या लोकांस
रोग होते तेहि त्याजकडे येऊन बरे झाले. १० तेव्हां
त्यांनीं आमचा बहुत प्रकारें सन्मान केला; आणि आम्ही
हाकारून निघालों तेव्हां आमच्या गरजेचे पदार्थ जहाजा-
वर भरले.

## रोमचा प्रवास पुढें सुरू

११ याप्रमाणें तीन महिन्यांनंतर आलेक्सांद्रियाचें
दयस्कुरै या निशाणीचें एक तारूं हिंवाळा घालविण्या-
करितां त्या बेटाजवळ राहिलें होतें त्यांत बसून आम्ही
निघालों. १२ मग सुराकूस येथें वरवा करून आम्ही तीन
दिवस राहिलों. १३ तेथून वळसा घेऊन आम्ही रेगियोनास
आलों; आणि एका दिवसानंतर दक्षिण वारा सुटल्यावर
दुसऱ्या दिवशीं आम्ही पुत्युलास पोहंचलों; १४ तेथें
आम्हांस बंधुजन भेटले, त्यांनीं आपल्या येथें सात दिवस
राहावयाची आम्हांस विनंति केली; असे आम्ही रोम येथें
आलों. १५ तेथले बंधुजन आम्हांविषयीं ऐकून अप्पि-
याची पेठ व तीन उतारशाळा एथपर्यंत आम्हांस सामोरे
आले; त्यांस पाहून पौलानें देवाचें उपकारस्मरण केलें,
आणि त्याला धैर्य आलें.

१६ आम्ही रोम शहरांत गेल्यावर [ जमादारानें
बंदिवानांस सेनापतीच्या स्वाधीन केलें, पण ] पौलाला
त्यावर पाहरा करणाऱ्या शिपायाबरोबर निराळें राहण्याची
परवानगी मिळाली.

## रोममधील यहूद्यांच्या पौल भेटी घेतो

१७ मग असें झालें कीं तीन दिवसांनंतर पौलानें
यहूद्यांचे जे मुख्य पुरुष होते त्यांस एकत्र बोलाविलें;
ते एकत्र मिळाल्यावर तो त्यांस म्हणाला, बंधुजनहो, मीं
आपल्या लोकांविरुद्ध किंवा पूर्वजांच्या संप्रदायांविरुद्ध कांहीं
केलें नसतां मला यरुशलेमांत बंदिवान करून रोमी
लोकांच्या हातीं देण्यांत आलें; १८ त्यांनीं चौकशी
केल्यावर मजकडे मरणास योग्य असा कांहीं दोष
नसल्यामुळें ते मला सोडण्यास पाहत होते; १९ परंतु
यहूद्यांनीं विरोध केल्यामुळें कैसराजवळ न्याय
मागणें मला भाग पडलें; तरी मला आपल्या
राष्ट्रावर कांहीं दोषारोप करावयाचा होता असें नाहीं.
२० याकरितां तुमची भेट घेऊन तुम्हांबरोबर भाषण
करावें म्हणून तुम्हांस बोलाविलें; इस्राएलाच्या आशेमुळें
मी या सांखळीनें बांधलेला आहें. २१ त्यांनीं त्याला
म्हटलें कीं आपल्यासंबंधानें यहूदीयाहून आम्हांस कांहीं
पत्रें आलीं नाहींत, किंवा बंधुजनांतील कोणीं एथें येऊन
आपणाविषयीं कांहीं प्रतिकूळ बातमी आणली नाहीं अगर
कांहीं सांगितलें नाहीं; २२ तरी आपले विचार काय
आहेत ते आपणापासून ऐकून घ्यावे हें आम्हांला योग्य
वाटतें; कारण या पंथाविषयीं म्हटलें तर लोक त्याविरुद्ध
सर्वत्र बोलतात, हें आम्हांस ठाऊक आहे.

२३ तेव्हां त्यांनीं एक दिवस नेमस्त करून त्याला
सांगितल्यावर त्या दिवशीं पुष्कळ लोक त्याच्या बिऱ्हाडीं
आले; त्यांस देवाच्या राज्याविषयीं साक्ष देण्याकरितां
आणि येशूविषयीं मोशाच्या नियमशास्त्रावरून व संदेष्ट-
लेखांवरून त्यांची खातरी करण्याकरितां तो सकाळपासून
संध्याकाळपर्यंत त्या विषयाची फोड करीत होता. २४
त्यानें जें सांगितलें त्यावर कित्येकांनीं विश्वास ठेविला व
कित्येकांनीं ठेविला नाहीं. २५ त्यांचें आपसांत एकमत
न झाल्यामुळें ते उठून जाऊं लागले, तेव्हां पौलानें त्यांस
एक वचन सांगितलें; पवित्र आत्मा यशया संदेष्ट्याच्या
द्वारें तुमच्या पूर्वजांबरोबर बोलला तें ठीक बोलला;
तें असें; २६ या लोकांकडे जाऊन सांगा कीं

तुम्ही ऐकाल तर खरें,
परंतु समजणार नाहीं;
व पाहाल तर खरें,
परंतु तुम्हांस दिसणार नाहीं;
२७ कारण या लोकांचें अंतःकरण जड झालें आहे;
ते कानांनीं मंद ऐकतात;
आणि आपले डोळे त्यांनीं मिटले आहेत;
यासाठीं कीं त्यांनीं डोळ्यांनीं पाहूं नये,
कानांनीं ऐकूं नये,
मनानें समजूं नये,
त्यांनीं वळूं नये,
आणि मीं त्यांस बरें करूं नये;
२८ म्हणून तुम्हांस ठाऊक असो कीं हें देवाचें तारण
विदेशी लोकांकडे पाठविलें आहे; आणि ते तें श्रवण
करतील. [ २९ तो असें बोलल्यावर यहूदी आपल्या-
मध्यें फार विवाद करीत निघाले. ]

### समाप्ति

३० तो आपल्या भाड्याच्या घरांत पुरीं दोन वर्षें
राहिला, आणि जे त्याजकडे येत असत त्या सर्वांचें तो
स्वागत करीत असे. ३१ कोणापासून अडथळा न होतां
तो पूर्ण धैर्यानें देवाच्या राज्याची घोषणा करीत असे,
आणि प्रभु येशू ख्रिस्ताविषयींच्या गोष्टी शिकवीत असे.

---

# पौलाचें रोमकरांस पत्र

### आशीर्वाद

१ पवित्र जन होण्याकरितां पाचारण्यांत आलेले
१ रोम एथील देवाचे प्रिय जन, ह्या सर्वांस प्रेषित होण्या-
करितां बोलविण्यांत आलेला, देवाच्या सुवार्तेकरितां
वेगळा केलेला, येशू ख्रिस्ताचा दास पौल त्याजकडून: २
आपल्या पुत्राविषयींची ती सुवार्ता देवानें पवित्र शास्त्रांत
आपल्या संदेष्ट्यांच्या द्वारें पूर्वी कळविली होती; ३ देह-
दृष्ट्या दावीद वंशाचा, मेलेल्यांच्या उठण्यावरून ४ पवित्रता-
संपन्न आत्म्याच्या योगें पराक्रमानें देवाचा पुत्र ठरलेला,
असा आपला प्रभु येशू ख्रिस्त, ५ त्याच्याद्वारें आम्हांस
कृपा व प्रेषितपणा हीं मिळालीं; अशासाठीं कीं त्याच्या
नामाकरितां सर्व राष्ट्रांतील लोकांनीं विश्वासाधीन व्हावें;
६ त्यांच्यापैकीं येशू ख्रिस्ताचे होण्यास निमंत्रित झालेले
असे तुम्हीहि आहां; ७ त्या तुम्हांस आपला पिता देव व
प्रभु येशू ख्रिस्त यांजपासून कृपा व शांति असो.

### रोम शहराला भेट देण्याचा पौलाचा बेत

८ तुमचा विश्वास सर्व जगांत प्रसिद्ध होत आहे, म्हणून
प्रथम तुम्हां सर्वांमुळें येशू ख्रिस्ताच्या द्वारें मी आपल्या
देवाचें उपकारस्मरण करितों. ९ तुमची आठवण मी
अखंड कशी करितों, म्हणजे मी आपल्या प्रार्थनाप्रसंगीं
कशी सर्वदा विनंति करीत असतों कीं कसेंहि करून आतां
तरी मला देवाच्या इच्छेनें तुम्हांकडे येण्याचा लाभ व्हावा,
१० याविषयीं, ज्या देवाची सेवा मी आपल्या आत्म्यानें
त्याच्या पुत्राच्या सुवार्तेंत करितों, तो माझा साक्षी आहे.
११ तुमची स्थिरता होण्याकरितां मी तुम्हांस कांहीं
आत्मिक कृपादान द्यावें म्हणून तुमची भेट घेण्याची मला
फार उत्कंठा आहे; १२ म्हणजे तुमच्या व माझ्याहि
विश्वासानें आपणां उभयतांस मला तुम्हांविषयीं व तुम्हांला
मजविषयीं समाधान प्राप्त व्हावें. १३ बंधुजनहो, जशी
इतर विदेशी लोकांत मला फलप्राप्ति झाली तशी तुम्हांतहि
व्हावी म्हणून मी पुष्कळदां तुम्हांकडे येण्याचा बेत केला,
( पण आतांपर्यंत मला अडथळे आले, ) याविषयीं तुम्हीं
अजाण असावें अशी माझी इच्छा नाहीं. १४ हेल्लेणी व
बर्बर, ज्ञानी व अज्ञानी, या दोहोंचाहि मी ऋणी आहें.

१५ याप्रमाणें रोम शहरांत राहणाऱ्या तुम्हांसहि सुवार्ता
सांगण्याची माझ्या ठायीं उत्सुकता आहे.

### सुवर्तमानाचें स्वरूप

१६ मला सुवार्तेची लाज वाटत नाहीं; कारण प्रत्येक
विश्वास ठेवणाऱ्याला ती तारणप्राप्त्यर्थ देवाचें सामर्थ्य
अशी आहे; प्रथम यहूद्यांस आणि मग हेल्लेण्यांस. १७
कारण तिच्यांत देवाचें न्यायत्व विश्वासानें विश्वासासाठीं
प्रकट होतें; 'नीतिमान् विश्वासानें वांचेल' असा
शास्त्रलेख आहे.

### विदेशी लोकांची दुष्टाई

१८ जीं मनुष्यें अनीतीनें सत्य दाबून ठेवितात
त्यांच्या अधर्मावर व अनीतीवर देवाचा क्रोध स्वर्गातून
प्रकट होतो. १९ देवाविषयींचें जें ज्ञान होत असतें तें
त्यांच्या मनास व्यक्त केलेलें आहे; कारण देवानें तें
त्यांस व्यक्त केलें आहे. २० त्याचे अदृश्य गुण
म्हणजे त्याचें सनातन सामर्थ्य व देवत्व हीं निर्मिलेल्या
पदार्थांवरून ज्ञात होऊन सृष्टीच्या उत्पत्तिकालापासून स्पष्ट
दिसत आहेत, यासाठीं कीं त्यांनीं निरुत्तर व्हावें; २१
कारण देवाला ओळखत असूनहि त्यांनीं देव म्हणून त्याचें
गौरव केलें नाहीं, व त्याचे आभार मानिले नाहींत; तर ते
आपल्या पोकळ कल्पनांनीं शून्यवत् झाले, आणि त्यांचें
मूढ मन अंधकारानें व्याप्त झालें. २२ आपण ज्ञानी आहों
असें म्हणवीत असतां ते मूर्ख झाले; २३ आणि त्यांनीं
अविनाशी देवाच्या गौरवाचा, नाशवंत मनुष्य, पक्षी,
चतुष्पाद प्राणी व सरपटणारे जीव यांच्या आकाराच्या
मूर्तीशीं मोबदला केला.

२४ यास्तव ते आपल्या मनाच्या वासनांत असतांना
देवानें त्यांस अमंगळपणाच्या स्वाधीन केलें; त्यामुळें
त्यांच्यामध्यें त्यांच्या शरीरांचा अवमान झाला; २५ त्यांनीं
देवाच्या सत्याचा असत्याशीं मोबदला केला आणि त्याला
सोडून उत्पन्न केलेल्या पदार्थांची भक्ति व सेवा केली; तो
उत्पन्नकर्ता युगानुयुग धन्यवादित आहे. आमेन.

२६ यामुळें देवानें त्यांस निंद्य मनोभावनांच्या स्वाधीन
केलें; त्यांच्यांतल्या स्त्रियांनीं स्वाभाविक व्यवहार सोडून
विपरीत व्यवहार धरिला; २७ तसेंच पुरुषांनींहि स्त्रियां-
बरोबरचा स्वाभाविक व्यवहार सोडून परस्परें कामसंतप्त
होऊन पुरुषांनीं पुरुषांबरोबर अनुचित कर्म केलें, आणि
त्यांच्या भ्रांतीचें योग्य प्रतिफळ त्यांनीं आपल्या
ठायीं भोगिलें.

२८ ज्या अर्थी देवाचें पूर्ण ज्ञान प्राप्त करून घेण्यास
ते मान्य झाले नाहींत त्या अर्थी देवानें त्यांस अनुचित
कर्मे करण्यास भ्रष्ट अशा मनाच्या स्वाधीन केलें. २९ सर्व
अनीति, दुष्टपणा, लोभ, वाईटपणा यांनीं ते भरलेले होते;
हेवा, हत्या, कलह, कपट, कुबुद्धि यांनीं ते पूर्ण असे होते;
३० ते चहाड, निंदक, देवद्वेष्टे, उद्धट, गर्विष्ठ, आत्म-
श्लाघी, कुकर्मकल्पक, मातापितरांची अवज्ञा करणारे, ३१
बुद्धिहीन, वचनभंग करणारे, ममताहीन, निर्दय, असे
होते; ३२ जे असें आचरण करितात ते मरणास योग्य
आहेत, असा देवाचा नियम त्यांस ठाऊक असतांहि, ते
स्वतः तीं कर्मे करितात, इतकेंच केवळ नव्हे, तर तसें
आचरण करणाऱ्यांस त्यांची संमतिहि आहे.

### यहूदीसुद्धां दोषी आहेत

२ १ यास्तव हे मानवा, जो तूं न्यायनिवाडा कर-
तोस तो तूं कोणीहि असलास तरी तूं निरुत्तर आहेस;
ज्याविषयीं तूं दुसऱ्याचा न्याय करितोस त्याचविषयीं
तूं स्वतांला अन्यायी ठरवितोस; कारण न्यायनिवाडा देणारा
तूं तींच कर्मे करितोस; २ पण आपल्याला ठाऊक आहे कीं जे
अशीं कर्मे करितात त्यांजविरुद्ध देवाचा न्याय सत्यानुसार
होतो. ३ तर हे मानवा, जो तूं तशीं कर्मे आचरणा-
ऱ्यांचा न्यायनिवाडा करीत असून तींच स्वतः करितोस
तो तूं देवाचा न्याय चुकविशील असें तुला वाटतें काय?
४ किंवा देवाची दया तुला पश्चात्ताप करावयास लावणारी
आहे हें न समजतां, त्याचें दयाळुत्व, क्षमा व सहन-
शीलता हीं विपुल असल्यामुळें त्याचा अवमान करितोस
काय? ५ आपला हट्ट व पश्चात्तापहीन अंतःकरण यांस
अनुरूप तूं जो क्रोधाचा व देवाचा यथार्थ न्याय प्रकट
होण्याचा दिवस त्या दिवसाचा क्रोध आपणासाठीं साठ-
वून ठेवितोस; ६ 'तो प्रत्येकाला ज्याच्या त्याच्या कर्मां-
प्रमाणें फळ देईल;' ७ धीरानें सत्कर्मे करीत राहून
जे गौरव, सन्मान व अविनाशिता यासाठीं खटपट करितात

त्यांस तो सार्वकालिक जीवन देईल; ८, ९ परंतु जे तट
पाडणारे आहेत व सत्याला न मानितां अधर्माला मानितात,
त्यांजवर क्रोध व कोप, संकट व क्लेश हीं येतील; म्हणजे
दुष्कर्म करणारा मनुष्य, प्रथम यहूदी आणि मग हेल्लेणी,
अशा प्रत्येकाच्या जिवावर तीं येतील; १० पण प्रत्येक
सत्कर्म करणारा, प्रथम यहूदी आणि मग हेल्लेणी, यांस
गौरव, सन्मान व शांति हीं मिळतील; ११ कारण देवा-
जवळ पक्षपात नाहीं. १२ ज्यांस नियमशास्त्र नाहीं अशा
जितक्यांनीं पाप केलें तितकेहि नियमशास्त्र नाहीं तरी
नाश पावतील; आणि नियमशास्त्र असतां जितक्यांनीं पाप
केलें तितक्यांचा न्याय नियमशास्त्रानें होईल; १३ नियम-
शास्त्र श्रवण करणारे देवाच्या दृष्टीनें नीतिमान् आहेत
असें नाहीं, तर नियमशास्त्राप्रमाणें आचरण करणारे नीतिमान्
ठरतील; १४ ज्यांस नियमशास्त्र नाहीं असे विदेशी लोक
जेव्हां नियमशास्त्रांत आहे तें स्वभावतः करितात तेव्हां,
त्यांस नियमशास्त्र नाहीं तरी, ते आपणां स्वतःस नियम-
शास्त्रच आहेत; १५ म्हणजे ते नियमशास्त्रांतील आचार
आपल्या अंतःकरणांत लिहिलेला दाखवितात, त्यांचें मनहि
त्यांस साक्ष देतें, आणि त्यांचे एकमेकांविषयींचे विचार
दोष लावणारे किंवा दोषमुक्त करणारे असतात; १६ ज्या
दिवशीं देव माझ्या सुवार्तेप्रमाणें येशू ख्रिस्ताच्या द्वारें
मनुष्यांच्या गुप्त गोष्टींचा न्याय करील त्या दिवशीं निर्णय
होईल.

१७ तुला यहूदी हें नांव आहे; तूं नियमशास्त्राचा
आश्रय धरितोस, व देवाविषयीं अभिमान बाळगितोस;
१८ तुला त्याची इच्छा कळते; आणि नियमशास्त्राच्या
श्रवणानें शिक्षण मिळाल्यामुळें जें श्रेष्ठ तें पसंत करितोस;
१९ नियमशास्त्रांत मला ज्ञानाचें व सत्याचें स्वरूप मिळालें
आहे म्हणून मी अंधळ्यांचा वाटाडी, जे अंधारांत आहेत
त्यांचा प्रकाश, २० अल्पबुद्धि लोकांचा शिक्षक,
बाळकांचा गुरु आहें, अशी तुझी खातरी आहे;
२१ असा जो तूं दुसऱ्यास शिकवितोस तो तूंच स्वतःला
शिकवीत नाहींस काय? जो तूं चोरी करूं नये अशी
घोषणा करितोस तो तूंच चोरी करितोस काय? २२ जो
तूं व्यभिचार करूं नये असें सांगतोस, तो तूंच व्यभिचार
करितोस काय? जो तूं मूर्तींचा विटाळ मानितोस, तो तूंच
देवळें लुटितोस काय? २३ जो तूं नियमशास्त्राचा अभिमान
बाळगितोस, तो तूंच नियमशास्त्राच्या उल्लंघनानें देवाचा
अपमान करितोस काय? २४ 'तुम्हांमुळें विदेशी लोकांत
देवाच्या नामाची निंदा होत आहे,' असा शास्त्रलेख आहे.
२५ जर तूं नियमशास्त्राप्रमाणें करितोस तर सुंतेचा उपयोग
आहे; परंतु नियमशास्त्राचें उल्लंघन करणारा असलास तर
तुझी सुंता बेसुंता अशी झाली आहे. २६ तर मग बेसुंती
मनुष्यानें नियमशास्त्राचे नियम पाळिले, तर त्याची बेसुंता
सुंता अशी मोजण्यांत येईल कीं नाहीं? २७ शास्त्रलेख व
सुंता तुझ्या बाजूला असतांना जो तूं नियमशास्त्राचें उल्लंघन
करणारा आहेस त्या तुझा न्याय, जो जातीनें बेसुंती
वर्गांतला असून नियमशास्त्र पाळितो, तो करणार नाहीं
काय? २८ कारण जो बाहेरून यहूदी तो यहूदी नव्हे;
आणि देहाची जी बाहेरून होते ती सुंता नव्हे; २९ तर
अंतरीं जो यहूदी तो यहूदी होय; आणि आध्यात्मिक दृष्ट्या
जी अंतःकरणाची व्हावयाची ती सुंता होय; शास्त्र-
लेखाप्रमाणें व्हावयाची ती नव्हे; अशाची प्रशंसा मनुष्या-
पासून नव्हे, तर देवापासून व्हावयाची.

### आक्षेपांना उत्तरें

१ तर मग यहूद्यांची श्रेष्ठता ती काय? आणि
३ सुंतेचा लाभ तो काय? २ सर्व बाजूंनीं पुष्कळच
आहे. प्रथम हें कीं देववचनें त्यांस सोपलेलीं होतीं.
३ कित्येकांनीं विश्वास ठेविला नाहीं तरी काय झालें?
त्यांच्या विश्वासहीनतेमुळें देवाची विश्वसनीयता व्यर्थ
होईल काय? ४ असें न होवो; त्यापेक्षां देव खरा ठरो
आणि प्रत्येक मनुष्य खोटा असा होवो; शास्त्रलेख
म्हणतो कीं:

तूं आपल्या वचनांत नीतिमान् ठरावें.

आणि तुझा न्याय होत असतां तुला जय मिळावा;
५ तरी पण आपल्या अनीतीमुळें देवाचें नीतिमत्त्व
स्थापित होतें तर यावरून काय म्हणावें? देव जो शासन-
कर्ता तो अनीतिमान् आहे असें म्हणावें काय? (मी
मानवी व्यवहाराप्रमाणें बोलतों.) ६ असें न होवो;
असें झालें तर देव जगाचा न्याय कसा करील? ७ तसेंच

माझ्या असत्यानें देवाचें सत्य त्याच्या गौरवाला अतिसंवर्धक
झालें तर मग माझा न्याय पापी मनुष्याचा होतो तसा
कां व्हावा? ८ बरें होण्यासाठीं आपण वाईट करूं या,
असें कां म्हणूं नये? (आम्ही असेंच म्हणतों, असा किती-
एक लोक आम्हांवर आळ घालतात;) अशांना दंडाज्ञा
व्हावी हेंच यथान्याय आहे.

### मनुष्यप्राणी पातकी आहे; नीतिमान् कोणी नाहीं

९ तर मग कसें? आपण श्रेष्ठ आहों काय? मुळींच
नाहीं; कारण यहूदी व हेल्लेणी, हीं उभयतां पापवश आहेत
असा आरोप आम्हीं सर्वांवर अगोदरच ठेविला आहे;
१० शास्त्रलेख म्हणतो:
नीतिमान् कोणी नाहीं, एक देखील नाहीं;
११ जाणता कोणी नाहीं,
देवाचा शोध करणारा कोणी नाहीं;
१२ सर्व बहकले आहेत, ते एकंदर निरुपयोगी
झाले आहेत;
सत्कर्म करणारा असा कोणी नाहीं, एकहि नाहीं;
१३ त्यांचा घसा केवळ उघडें थडें आहे;
त्यांनीं आपल्या जिभांनीं कपट केलें आहे;
त्यांच्या ओठांच्या आंत जोगी सर्पांचें विष आहे;
१४ त्यांचें तोंड शापानें व कडूपणानें भरलेलें आहे;
१५ त्यांचे पाय रक्तपात करावयास उतावळे आहेत;
१६ त्यांच्या मार्गांत विध्वंस व विपत्ति आहेत;
१७ शांतीचा मार्ग त्यांनीं समजून घेतला नाहीं.
१८ त्यांच्या डोळ्यांपुढें देवाचें भय नाहीं.

१९ आपणांला ठाऊक आहे कीं नियमशास्त्र जें कांहीं
सांगतें तें शास्त्राधीन असलेल्या लोकांस सांगतें; यासाठीं
कीं प्रत्येक तोंड बंद व्हावें व अवघें जग देवदंडास प्राप्त
व्हावें; २० त्याजसमोर कोणी मनुष्य नियमशास्त्रांतील
कर्मांनीं नीतिमान् ठरणार नाहीं; कारण नियमशास्त्राच्या
द्वारें पापाचा बोध होतो.

### ख्रिस्तावरील विश्वासाच्या द्वारें नीतिमत्त्व-प्राप्ति

२१ आतां नियमशास्त्राविरहित असें जें देवाचें नीति-
मत्त्व तें प्रकट झालें आहे, त्यास नियमशास्त्राची व
संदेष्ट्यांची साक्ष आहे; २२ हें देवाचें नीतिमत्त्व येशू
ख्रिस्तावरील विश्वासाच्या द्वारें सर्व विश्वास ठेवणाऱ्यां-
साठीं आहे; त्यांत भेद नाहीं. २३ कारण सर्वांनीं
पाप केलें आहे, आणि देवाच्या गौरवाला ते अंतरले
आहेत. २४ ते ख्रिस्त येशूनें खंडणी भरून प्राप्त
केलेल्या मुक्तीच्या द्वारें देवाच्या कृपेनें मोबदल्यावांचून
नीतिमान् ठरतात. २५ त्याच्या रक्तानें विश्वासाच्या द्वारें
प्रायश्चित्त होण्यास देवानें त्याला पुढें ठेविलें, यासाठीं कीं पूर्वी
झालेल्या पापांची देवाच्या सहनशीलतेनें उपेक्षा झाल्यामुळें
त्यानें आपलें नीतिमत्त्व व्यक्त करावें; २६ आपलें नीतिमत्त्व
सांप्रतकाळीं असें दाखवावें कीं आपण नीतिमान् असावें
आणि येशूवर विश्वास ठेवणाऱ्याला नीतिमान् ठरविणारें
असावें. २७ तर मग फुशारकी मारणें कोठें? ती बाहेरच्या
बाहेर राहून गेली. कोणत्या प्रकारच्या नियमानें? कर्मांच्या
काय? नाहीं, तर विश्वासाच्या नियमानें. २८ यावरून
मनुष्य नियमशास्त्रांतील कर्मांवांचून विश्वासानें नीतिमान्
ठरतो असें आपण मानितों. २९ देव केवळ यहूद्यांचाच
आहे काय? विदेशी लोकांचाहि नव्हे काय? हो, आहे.
३० जर देव एकच आहे, आणि तो सुंती लोकांस विश्वा-
सानें व बेसुंती लोकांस विश्वासाच्या द्वारें नीतिमान् ठरवील,
तर तो विदेशी लोकांचाहि आहे.

३१ आपण विश्वासानें नियमशास्त्राला निरर्थक करितों
काय? असें अगदीं नाहीं; उलट आपण नियमशास्त्राची
स्थापना करितों.

### अब्राहामाचें उदाहरण

४ १ तर मग आपला पूर्वज अब्राहाम यानें देह-
स्वभावानें काय मिळविलें म्हणून म्हणावें? २ अब्रा-
हाम कर्मांनीं नीतिमान् ठरला असता तर त्याला अभि-
मान बाळगण्यास कारण असतें; तरी देवासमोर नसतें.
३ शास्त्र काय सांगतें? 'अब्राहामानें देवावर विश्वास
ठेविला, आणि हें त्याला नीतिमत्त्व असें मोजण्यांत आलें.'
४ आतां मजुराची मजुरी, ऋण अशी गणली जाते; मेहर-
बानगी अशी नाहीं; ५ पण कर्म न करितां अधर्म्याला
नीतिमान् ठरविणाऱ्यावर विश्वास ठेवणाऱ्याचा विश्वास

नीतिमत्त्व असा मोजण्यांत येतो. ६ याप्रमाणें ज्या मनुष्या-
कडे देव कर्मावांचून नीतिमत्त्व मोजितो त्याचा धन्यवाद
दावीदहि करितो, ७ तो असा :

ज्यांच्या अपराधांची क्षमा झाली आहे,
व ज्यांच्या पापांवर पांघरूण घातलें आहे, ते धन्य.
८ ज्या मनुष्याच्या हिशेबीं प्रभु पापाचा दोष लावीत
नाहीं तो धन्य.

९ हें आशीर्वचन सुंती लोकांस किंवा बेसुंती लोकांसहि
आहे ? विश्वास हा अब्राहामाकडे नीतिमत्त्व असा गणला
होता, असें आपण म्हणतों. १० तो कसा गणला गेला ?
तो सुंती असतांना किंवा बेसुंती असतांना ? सुंती असतांना
नव्हे; तर बेसुंती असतांना; ११ आणि बेसुंती असतांना
त्याच्या असलेल्या विश्वासावरून जें नीतिमत्त्व त्याचा
शिक्का अशी सुंता ही खूण त्याला मिळाली; यासाठीं कीं जे
बेसुंती लोक असतां विश्वास ठेवितात त्या सर्वांचा त्यानें
बाप व्हावें, म्हणजे त्यांच्याकडेहि नीतिमत्त्व मोजलें जावें;
१२ त्यानें सुंती लोकांचा बाप व्हावें, पण जे सुंती त्यांचा
केवळ नाहीं, तर आपला बाप अब्राहाम बेसुंती असतां
त्याचा जो विश्वास होता त्याला अनुसरून चालणाऱ्यांचाहि
व्हावें. १३ कारण तूं जगाचा वारीस होशील, हें वचन
अब्राहामाला व त्याच्या संततीला नियमशास्त्राच्या द्वारें
नव्हतें, तर विश्वासावरून जें नीतिमत्त्व त्याच्या द्वारें होतें.
१४ नियमशास्त्रावलंबी जर वारीस होतात तर विश्वास
निरर्थक झाला आहे आणि देववचनहि व्यर्थ झालें आहे.
१५ नियमशास्त्र क्रोधाला कारण होतें; कारण कीं जेथें
नियमशास्त्र नाहीं, तेथें उल्लंघनहि नाहीं. १६ या कारणा-
स्तव तें कृपेचें असावें म्हणून विश्वासानें झालें; यासाठीं कीं
तें वचन अवघ्या संततीला म्हणजे नियमशास्त्रावलंबी
इसमांलाहि केवळ नाहीं, तर जो अब्राहाम आपल्या
सर्वांचा बाप त्याच्या विश्वासाच्या अवलंबी इसमांलाहि
निश्चित व्हावें. १७ (याविषयीं असा शास्त्रलेख आहे:
'मीं तुला पुष्कळ राष्ट्रांचा बाप केलें आहे;') ज्या
देवावर त्यानें विश्वास ठेविला, जो देव मेलेल्यांस जीवंत
करितो, व जें नाहीं त्यास तें असल्यासारिखी आज्ञा
करितो, *त्याच्या दृष्टीनें तो असा आहे.* १८ त्यानें आशेचा
संभव नसतांहि आशेनें विश्वास धरिला, यासाठीं कीं 'तशी
तुझी संतति होईल' असें जें वचन त्याप्रमाणें त्यानें बहुत
राष्ट्रांचा बाप व्हावें. १९ आपलें निर्जीव झालेलें शरीर
(तो सुमारें शंभर वर्षांचा होता) व सारा हिच्या
गर्भाशयाचें निर्जीवपण हीं त्याच्या लक्षांत होतीं; तथापि
विश्वासाला दुर्बळता येऊं न देतां, २० त्यानें देववचनाकडे
पाहून अविश्वासामुळें आपली डळमळ होऊं दिली नाहीं,
तर विश्वासानें प्रबळ होऊन त्यानें देवाचें गौरव केलें. २१
आपण दिलेलें वचन पूर्ण करावयासहि तो समर्थ आहे
असा त्याचा पूर्ण निश्चय होता; २२ म्हणून 'तें त्याज-
कडे नीतिमत्त्व असें मोजण्यांत आलें.' २३ 'तें त्याजकडे
मोजण्यांत आलें,' हें केवळ त्याजसाठीं लिहिलें असें नाहीं,
२४, २५ तर ज्या आपल्या प्रभु येशूला आपल्या
अपराधांमुळें धरून देण्यांत आलें व आपण नीतिमान्
ठरावें म्हणून ज्याला पुनः उठविण्यांत आलें; त्याला मेले-
ल्यांतून ज्यानें उठविलें त्याजवर विश्वास ठेवणाऱ्या ज्या
आपणांकडे तें मोजिलें जाईल, त्यांसाठींहि लिहिलें आहे.

### विश्वासाचे परिणाम

५ १ यास्तव आपण विश्वासानें नीतिमान् ठरविलेले
आहों म्हणून आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या द्वारें आप-
णास देवाबरोबर असलेल्या शांतीचा लाभ घडो; २
ज्या कृपेंत आपण आहों तिच्यांत त्याच्याद्वारें आपला
प्रवेशहि विश्वासानें झाला आहे; आणि आपण देवाच्या
गौरवाच्या आशेमुळें जयोत्सव करूं. ३ असें केवळ नाहीं,
तर संकटांतहि जयोत्सव करूं, कारण आपल्याला ठाऊक
आहे कीं संकटाचा परिणाम धीर हा होतो; ४ धीराचा
परिणाम कसाला लागणें; कसाला लागण्याचा परिणाम आशा;
५ आशा मनोभंग करीत नाहीं; कारण आपणांला दिलेल्या
पवित्र आत्म्याच्या द्वारें आपल्या अंतःकरणांत देवाच्या
प्रीतीचा वर्षाव झाला आहे.

### ख्रिस्ताच्या मृत्यूंत ईश्वराचें प्रेम प्रगट होतें

६ आपण दुर्बळ होतों तेव्हां ख्रिस्त सुसमयीं पापी
लोकांसाठीं मरण पावला. ७ नीतिमान् मनुष्यासाठीं कोणी
मरणारा विरळा, चांगल्या मनुष्यासाठीं मरण्यास कदाचित्
*कोणी धाडस करील;* ८ परंतु देव आपल्यावरच्या स्वप्रे-

याचें प्रमाण हें देतो कीं आपण पापी असतां ख्रिस्त
आपणांसाठीं मरण पावला. ९ तर आपण जे आतां त्याच्या
रक्तानें नीतिमान् ठरलों आहों ते आपण विशेषेंकरून
त्याच्या द्वारें देवाच्या क्रोधापासून तरले जाऊं. १०
आपण शत्रु असतां देवाबरोबर त्याच्या पुत्राच्या मृत्युद्वारें
आपला समेट झाला, तर आतां समेट झाला असतां
त्याच्या जीवनानें विशेषेंकरून आपण तरले जाऊं; ११
इतकेंच केवळ नाहीं, तर ज्याच्याद्वारें समेट ही देणगी
आपल्यास आतां मिळाली त्या आपल्या प्रभु येशू
ख्रिस्ताच्या द्वारें आपण देवाच्या ठायीं जयोत्सव करूं.

## आदामाच्या द्वारें मृत्यु; ख्रिस्ताच्या द्वारें जीवनप्राप्ति

१२ ह्या प्रकारें एका मनुष्याच्याद्वारें पाप जगांत
आलें आणि पापाच्या द्वारें मरण आलें; आणि सर्वांनीं
पाप केल्यावरून सर्व मनुष्यांत मरण पसरलें. १३ पाप
नियमशास्त्रापूर्वी जगांत होतेंच; पण नियमशास्त्र नसलें
म्हणजे पाप मोजण्यांत येत नाहीं. १४ तथापि आदामा-
पासून मोशापर्यंत, ज्यांनीं आदामाच्या उल्लंघनाच्या
प्रकाराप्रमाणें पाप केलें नाहीं त्यांजवरहि मरणानें राज्य
केलें; तो तर, जो येणार होता त्याची प्रतिमा होता.
१५ तरी पण जशी अपराधाची गोष्ट तशी कृपादानाची
नाहीं; कारण ह्या एकाच्या अपराधानें बहुत माणसें मरण
पावलीं, तर देवाची कृपा आणि तो एक पुरुष येशू ख्रिस्त
याच्या कृपेचें दान हीं बहुत जणांकरितां विशेषेंकरून विपुल
झालीं. १६ पाप केलेल्या एका इसमाच्या द्वारें जसें झालें
तसें दानाचें होत नाहीं; कारण ज्या न्यायाचा परिणाम
दंडाज्ञा तो एकावरून झाला, पण ज्या कृपादानाचा परिणाम
नीतिमान् ठरविलें जाणें असा आहे तें बहुत अपराधां-
वरून झालें. १७ त्या एकाच्या अपराधानें, त्या एकाच्या
द्वारें, मरणाचें राज्य चालू झालें; तर ज्यांस कृपा व
नीतिमत्त्वाचें दान यांची विपुलता मिळते ते विशेषेंकरून
त्या एका येशू ख्रिस्ताच्या द्वारें जीवनांत राज्य करितील.
१८ तर मग जसा एका अपराधानें सर्व मनुष्यांवर दंडाज्ञेचा
परिणाम झाला, तसा नीतिमान् ठरविलें जाण्याच्या एका
ठरावानें सर्व मनुष्यांवर जीवनदायी नीतिमत्त्व मिळणें हा
परिणाम झाला. १९ जसें त्या एका मनुष्याच्या आज्ञाभंगानें
बहुत जण पापी ठरले, तसें ह्या एकाच्या आज्ञापालनानें
बहुत जण नीतिमान् ठरतील. २० शिवाय नियमशास्त्राचा
प्रवेश झाला तो अपराध वाढण्यास साधनीभूत झाला;
तरी जेथें पाप वाढलें तेथें कृपा फारच विपुल झाली;
२१ यासाठीं कीं जसें पापानें मरणाच्या योगानें राज्य केलें,
तसें कृपेनें नीतिमत्त्वाच्या योगें सर्वकालच्या जीवनासाठीं
येशू ख्रिस्त आपला प्रभु याच्या द्वारें राज्य करावें.

## ख्रिस्ताशीं संयुक्त असणें व पाप करीत राहणें हीं परस्परविरोधी आहेत

६ १ तर आतां काय म्हणावें ? कृपा वाढावी म्हणून
आपण पापांत राहावें काय ? २ असें न होवो. जे
आपण पापाला मेलों त्या आपण यापुढें त्यांत राहावें
हें कसें ? ३ आपण जितक्यांनीं ख्रिस्त येशूमध्यें बाप्तिस्मा
घेतला, तितक्यांनीं त्याच्या मरणांत बाप्तिस्मा घेतला,
याविषयीं तुम्ही अजाण आहां काय ? ४ तर मग आपण
त्या मरणांतील बाप्तिस्म्यानें त्याजबरोबर पुरले गेलों;
यासाठीं कीं ज्याप्रमाणें ख्रिस्त पित्याच्या गौरवानें मेलेल्यां-
तून उठविला गेला त्याप्रमाणेंच आपणहि जीवनाच्या नावि-
न्यांत वागणूक करावी. ५ जर आपण त्याच्या मरणाच्या
प्रतिरूपानें त्याच्याबरोबर संयुक्त झालों आहों, तर त्याच्या
उठण्याच्याहि प्रतिरूपानें त्याच्याबरोबर संयुक्त होऊं; ६
आपल्याला असें समजतें कीं आपलें जुनें मनुष्यपण त्याज-
बरोबर वधस्तंभावर खिळलें गेलें, असें कीं हें पापमय
शरीर नष्ट होऊन आपण पुढें पापाचें दास्य करूं नये; ७
कारण जो कोणी मेला तो पापाच्या दोषापासून मुक्त झाला
आहे. ८ आपण ख्रिस्ताबरोबर मेलों, तर याजबरोबर
जीवंत होऊनहि राहूं असा आपला विश्वास आहे; ९ आप-
णांस ठाऊक आहे कीं मेलेल्यांतून उठविलेला ख्रिस्त पुढें
मरत नाहीं; त्याजवर पुढें मरणाची सत्ता नाहीं. १० कारण
तो मेला, तो पापाला एकदांच मेला; तो जगतो, तो देवाला
जगतो. ११ तसे तुम्हीहि स्वतःस पापाला मेलेले आणि
ख्रिस्त येशूमध्यें देवाला जीवंत झालेले, असें माना.

१२ यास्तव तुम्ही आपल्या शरीरवासनांच्या अधीन न
व्हावें म्हणून आपल्या मर्त्य शरीरांत पापसत्ता चालूं देऊं

नका; १३ आणि तुम्ही आपले अवयव अनीतीचीं शस्त्रें
होण्याकरितां पापाला समर्पण करूं नका; तर आपण मेले-
ल्यांतून जीवंत झालेले असे स्वतःस देवाला समर्पण करा,
आणि आपले अवयव नीतीचीं शस्त्रें होण्याकरितां देवाला
समर्पण करा. १४ पापाची सत्ता तुम्हांवर चालणार नाहीं;
कारण तुम्ही नियमशास्त्राधीन नाहीं, तर कृपाधीन आहां.

### गुलामगिरीवरून घेतलेला धडा

१५ तर मग काय ? आपण नियमशास्त्राधीन नसून
कृपाधीन आहों म्हणून पाप करावें काय ? असें न होवो.
१६ आज्ञापालनाकरितां ज्याला तुम्ही स्वतःस दास असे
समर्पण करितां, ज्याची आज्ञा तुम्ही मानितां, त्याचे दास
तुम्ही आहां; ज्यांचा परिणाम मरण असे पापाचे दास,
किंवा ज्यांचा परिणाम नीतिमत्त्व असे आज्ञापालनाचे दास
तुम्ही आहां, हें तुम्हांस ठाऊक नाहीं काय ? १७ तुम्ही
पापाचे दास होतां, तरी ज्या शिकवणीच्या पदरीं तुम्हांस
बांधिलें तिच्याप्रमाणें तुम्हीं मनापासून वागणूक केली,
१८ आणि पापापासून मुक्त होऊन तुम्ही नीतिमत्त्वाचे
दास झालां, म्हणून देवाची स्तुति असो. १९ तुमच्या देह-
स्वभावाच्या दुर्बलतेमुळें मनुष्यव्यवहाराप्रमाणें मी बोलतों;
जसे तुम्हीं आपले अवयव अधर्म करण्याकरितां अमंग-
ळपण व अधर्म यांस दास असे समर्पण केले होते,
तसे आतां आपले अवयव पवित्रीकरणाकरितां
नीतिमत्त्वाला समर्पण करा. २० तुम्ही पापाचे दास होतां
तेव्हां नीतिमत्त्वासंबंधानें अलग होतां; २१ तर ज्या
गोष्टींची तुम्हांस आतां लाज वाटते त्यांपासून तुम्हांस त्या
वेळेस काय फळ प्राप्त झालें ? त्यांचा शेवट तर मरण
आहे; २२ परंतु आतां तुम्ही पापापासून मुक्त होऊन
देवाचे दास झाल्यामुळें तुम्हांस पवित्रीकरणाची फलप्राप्ति
झाली आहे, आणि सर्वकालचें जीवन हें उद्दिष्ट मिळालें
आहे. २३ पापाचें वेतन मरण आहे, पण देवाचें कृपादान
आपल्या प्रभु येशू ख्रिस्तामध्यें सर्वकालचें जीवन आहे.

### विवाहावरून घेतलेला धडा

१ बंधुजनहो, ( नियमशास्त्राची माहिती अस-
७ लेल्या लोकांबरोबर मी बोलत आहें, ) मनुष्य जीवंत
आहे तोंपर्यंत नियमशास्त्राची सत्ता त्याजवर चालते,
याविषयीं तुम्ही अज्ञ आहां काय ? २ नवरा जीवंत आहे
तोंपर्यंत सधवा स्त्री नियमशास्त्रानें त्याला बांधलेली आहे;
नवरा मृत्यु पावल्यावर तिची पतिनियमापासून सुटका
होते; ३ म्हणून नवरा जीवंत असतां ती दुसऱ्या
पुरुषाची झाली तर तिला व्यभिचारिणी म्हणतात; पण
नवरा गत झाल्यावर त्या नियमापासून ती मुक्त होते;
नंतर ती दुसऱ्या पुरुषाची झाली असतांहि व्यभिचारिणी
होत नाहीं. ४ त्याप्रमाणें बंधुजनहो, तुम्हीहि ख्रिस्तशरी-
राच्या द्वारें नियमशास्त्राला मेलेले आहां; यासाठीं कीं तुम्हीं
दुसऱ्याचें म्हणजे मेलेल्यांतून जो उठविला गेला त्याचें
व्हावें, आणि आपण देवाला फलदायी असें व्हावें. ५
आपण देहस्वभावास अधीन होतों तेव्हां नियमशास्त्राच्या
द्वारें उत्पन्न होणाऱ्या पापवासना आपल्या अवयवांत मर-
णाला फळ देण्यासाठीं प्रवृत्त होत्या. ६ आतां ज्यानें आपण
बद्ध होतों त्याला मरून आपण नियमशास्त्रापासून मुक्त
झालों आहों; म्हणून जुन्या रीतीनें, म्हणजे शास्त्रलेखास
धरून नव्हे, तर नव्या रीतीनें, अर्थात् आध्यात्मिकदृष्ट्या
दास्य करितों.

### नियमशास्त्र व पाप

७ तर मग काय म्हणावें ? नियमशास्त्र पाप आहे काय ?
असें अगदीं नाहीं; तरी पापाची ओळख नियमशास्त्रा-
वांचून कशानेंहि मला झाली नसती. 'लोभ धरूं नको,'
असें नियमशास्त्रांत सांगितलें नसतें तर लोभाचें ज्ञान मला
झालें नसतें. ८ ह्या आज्ञेच्या योगें पापानें संधि साधून
माझ्यांत सर्व प्रकारचा लोभ उत्पन्न केला. कारण नियम-
शास्त्रावांचून पाप निर्जीव आहे. ९ मी नियमशास्त्राविरहित
होतों तेव्हां जीवंत होतों, पण आज्ञा देण्यांत आल्यावर
पाप सजीव झालें, आणि मी मृत्यु पावलों. १० याप्रमाणें
ज्या आज्ञेचा परिणाम जीवन तिचाच परिणाम मरण आहे
असें माझ्या अनुभवास आलें; ११ कारण पापानें संधि
साधून आज्ञेच्या योगें फसविलें व तिच्या योगें मला जिवें
मारिलें. १२ तरी पण नियमशास्त्र पवित्र आहे, आणि
आज्ञा पवित्र, यथान्याय व उत्तम आहे. १३ तर मग जें
उत्तम तें मला मरण असें झालें काय ? असें अगदीं नाहीं.
पाप तें पाप असें दिसावें, म्हणून जें उत्तम त्याच्या योगें

तें मला मरणास कारण झालें; यासाठीं कीं आज्ञेच्या योगें
पाप पराकाष्ठेचें पापिष्ठ व्हावें.

### मनुष्यप्राण्याच्या दैहिक व आत्मिक भावनांचा लढा

१४ आपणांला ठाऊक आहे कीं नियमशास्त्र आध्या-
त्मिक स्वरूपाचें आहे, आणि मी तर दैहिक, पापाला
विकलेला, असा आहें. १५ कारण जें कर्म मी करितों
त्याचें मला ज्ञान नाहीं; म्हणजे जें माझ्या मनांत असतें
तें मी करितों असें नाहीं. तर जें मला द्वेष्य वाटतें तें
करितों. १६ जें माझ्या मनांत नसतें तें जर करितों
तर नियमशास्त्र उत्तम आहे अशी मी संमति देतों.
१७ ह्यावरून तें कर्म मी करितों असें नव्हे, तर माझ्या
ठायीं वसणारें पाप करितें. १८ कारण मला ठाऊक आहे
कीं माझ्याठायीं म्हणजे माझ्या देहस्वभावांत कांहीं चांगलें
वसत नाहीं; इच्छा करणें हें मला होतें, पण साधुकर्म करणें
होत नाहीं. १९ जें चांगलें करावें असें मला वाटतें तें मी
करीत नाहीं; तर करावेंसें वाटत नाहीं असें जें वाईट तें
मी करितों. २० जें करावेंसें वाटत नाहीं तें जर मी करितों,
तर तें कर्म मी करितों असें नव्हे, तर माझ्या ठायीं वस-
णारें पाप करितें. २१ जो मी साधुकर्म करूं पाहणारा त्या
मला हाच नियम आढळतो कीं वाईट तें पुढें येतें. २२
माझें अंतःस्थ जें आहे तें देवाच्या नियमशास्त्रामुळें हर्ष
करितें; २३ तरी माझ्या अवयवांत मला एक निराळाच
नियम दिसतो, तो माझ्या मनांतल्या नियमाबरोबर लढून
मला कैद करतो आणि माझ्या अवयवांतील पापाच्या
नियमाच्या स्वाधीन करितो. २४ किती मी कष्टी मनुष्य!
मला या मरणाच्या देहापासून कोण सोडवील? २५
आपला प्रभु येशू ख्रिस्त याच्या द्वारें मी देवाचें उपकार-
स्मरण करितों. ह्याप्रमाणें मी स्वतः मनानें देवाच्या नियमाचें
दास्य करितों; आणि देहानें पापाच्या नियमाचें दास्य करितों.

### पवित्र आत्म्याप्रमाणें चालणें

१ यावरून जे ख्रिस्त येशूमध्यें आहेत त्यांस
८ आतां दंडाज्ञा नाहीं. २ जो जीवनी आत्म्याचा
नियम त्यानें मला ख्रिस्त येशूमध्यें पाप व मरण
यांच्या नियमापासून मुक्त केलें. ३ नियमशास्त्र देहस्वभा-
वामुळें दुर्बळ असल्याकारणानें जें त्याला असाध्य तें
साधण्याकरितां देवानें आपल्या पुत्राला पापी देहासारख्या
देहानें व पापाकरितां पाठविलें आणि देहांत दंडाज्ञा करून
पापाचा मोड केला, ४ यासाठीं कीं जे आपण देहस्वभा-
वाप्रमाणें नव्हे तर आत्म्याप्रमाणें चालतों त्या आपणांमध्यें
नियमशास्त्रविहित आचरण पूर्णपणें व्हावें. ५ जे देहस्वभा-
वाचे आहेत ते दैहिक गोष्टींकडे चित्त लावितात; आणि
जे आध्यात्मिक मार्गानुसारी आहेत ते आत्मिक गोष्टींकडे
चित्त लावितात. ६ देहाचें चिंतन हें मरण; आत्म्याचें
चिंतन हें जीवन व शांति आहे; ७ कारण देहाचें चिंतन हें
देवाबरोबर वैर आहे; तें देवाच्या नियमशास्त्राच्या
अधीन नाहीं, आणि त्याच्यानें तसें होववत नाहीं;
८ जे देहाधीन आहेत त्यांच्यानें देवाला संतुष्ट कर-
वत नाहीं. ९ परंतु जर देवाचा आत्मा तुम्हांमध्यें
वास करितो तर तुम्ही देहाच्या अधीन नाहीं, आत्म्याच्या
अधीन आहां. जर कोणाला ख्रिस्ताचा आत्मा नाहीं
तर तो त्याचा नाहीं. १० जर ख्रिस्त तुम्हांमध्यें आहे तर
पापामुळें जरी शरीर मेलेलें आहे, तरी नीतिमत्त्वा-
मुळें आत्मा जीवमय आहे. ११ ज्यानें येशूला मेले-
ल्यांतून उठविलें त्याचा आत्मा जर तुम्हांमध्यें वास
करितो तर ज्यानें ख्रिस्ताला मेलेल्यांतून उठविलें तो
तुम्हांमध्यें वास करणाऱ्या आपल्या आत्म्यानें तुमचीं
मर्त्य शरीरें जीवंत करील.

१२ बंधुजनहो, आपण ऋणी आहों, तरी देह-
स्वभावाप्रमाणें वर्तावयाला देहस्वभावाचे ऋणी नाहीं; १३
जर तुम्ही देहस्वभावाप्रमाणें वर्ततां तर तुम्ही मराल;
परंतु जर तुम्ही आत्म्यानें शरीराचीं कर्में मारून टाकितां
तर जीवंत राहाल.

### देवाचे पुत्र

१४ जितक्यांस देवाचा आत्मा चालवितो ते देवपुत्र
आहेत; १५ कारण पुनः भीति बाळगावी असा दास-
पणाचा आत्मा तुम्हांस मिळाला नाहीं; तर ज्याच्या योगें
आपण अब्बा, बापा, अशी हांक मारितों असा दत्तक-
पणाचा आत्मा मिळाला आहे. १६ तो आत्मा स्वतः
आपल्या आत्म्याबरोबर साक्ष देतो कीं आपण देवाचीं

लेंकरें आहों; १७ आणि जर लेंकरें तर अर्थात् वारीसहि आहों, म्हणजे देवाचे वारीस, ख्रिस्ताबरोबर एकत्रांतील वारीस असे आहों; आपण त्याच्याबरोबर वैभव भोगावें म्हणून त्याच्यासह दुःख भोगितों तर आपण तसे वारीस आहों.

### प्रकट होणारें वैभव

१८ तर मग आपल्यासाठीं जें गौरव प्रकट होणार आहे त्याच्यापुढें सांप्रत काळच्यीं दुःखें कांहींच नाहींत असें मी मानितों. १९ सृष्टिहि अत्यंत उत्कंठेनें देवाच्या पुत्रांच्या प्रकट होण्याची अपेक्षा करिते. २० सृष्टि व्यर्थतेच्या स्वाधीन झाली ती आपखुशीनें नव्हे, तर ज्यानें ती अशी स्वाधीन केली त्याजमुळें; २१ सृष्टि स्वतः नश्वरतेच्या दास्यांतून मुक्त होऊन तिला देवाच्या लेंकरांची गौरवयुक्त मुक्तता मिळेल, ह्या आशेनें असें झालें. २२ आपल्याला ठाऊक आहे कीं सबंध सृष्टि आजपर्यंत कण्हत व वेदना भोगीत आहे. २३ इतकेंच केवळ नव्हे, तर ज्यां आपणाला आत्म्याचें प्रथम फळ मिळालें आहे ते आपणहि स्वतः दत्तकपणाची म्हणजे आपल्या शरीराच्या मुक्तीची वाट पाहत असतां आपल्या ठायीं कण्हतों. २४ आपण आशा धरल्यानें तरलों; आशा तर प्राप्त झालेल्याची नसते; जें प्राप्त झालें त्याची आशा कोण करील? २५ पण जें प्राप्त झालें नाहीं त्याची आशा जर आपण धरितों तर धीरानें त्याची वाट पाहतों.

२६ तसेंच आत्माहि आपल्या अशक्तपणांत आपल्याला हातभार लावितो; प्रार्थना करावी तशी करावयास आपल्याला समजत नाहीं; पण आत्मा स्वतः अनिर्वाच्य उच्छ्वासांनीं आपल्यासाठीं विनंति करितो; २७ आणि अंतर्यामें पारखणाऱ्याला त्या आत्म्याचा मनोभाव काय हें ठाऊक आहे; कारण हा आत्मा पवित्र जनांसाठीं देवाच्या मर्जीप्रमाणें विनंति करितो. २८ आपल्याला ठाऊक आहे कीं देवावर प्रीति करणाऱ्यांस म्हणजे त्याच्या संकल्पाप्रमाणें बोलाविलेल्यांस सर्व कांहीं त्यांच्या कल्याणार्थ सहकारी असें होतें. २९ कारण ज्यांच्याविषयींचें त्याला पूर्वज्ञान होतें त्यांनीं आपल्या पुत्राच्या प्रतिमेप्रमाणें बनावें म्हणून त्यानें त्यांना अगाऊच नेमून टाकिलें; ह्यांत हेतु हा कीं बंधुवर्गांत त्यानें ज्येष्ठ असें व्हावें. ३० ज्यांस त्यानें अगाऊ नेमून टाकिलें त्यांस त्यानें पाचारण केलें; ज्यांस पाचारण केलें त्यांस त्यानें नीतिमान् ठरविलें; आणि ज्यांस नीतिमान् ठरविलें त्यांचें त्यानें गौरव केलें.

### देवाचें प्रेम

३१ तर या गोष्टींवरून आपण काय म्हणावें? देव आपणांस अनुकूळ असल्यावर आपणांला प्रतिकूल कोण असणार? ३२ ज्यानें आपल्या पुत्रास राखून न ठेवितां आपणां सर्वांकरितां त्याला दिलें, तो त्याजसहित आपल्याला सर्व कांहीं कसें देणार नाहीं? ३३ देवाच्या निवडलेल्या लोकांवर दोषारोप कोण ठेवील? नीतिमान् ठरविणारा देव ठेवील काय? ३४ दंडाज्ञा करणारा कोण? जो मेला इतकेंच नाहीं, तर मेलेल्यांतून उठविला गेला, जो देवाच्या उजवीकडे आहे आणि आपल्यासाठीं विनंति करितो, असा जो ख्रिस्त येशू तो करील काय? ३५ ख्रिस्ताच्या प्रीतीपासून आपल्याला कोण विभक्त करील? क्लेश, आपत्ति, छळणूक, उपासमार, नग्नता, संकट, किंवा तरवार हीं वेगळें करितील काय? ३६ असा शास्त्रलेख आहे:

तुझ्यामुळें आमचा वध सतत होत आहे;

कापावयाच्या मेंढरांसारखें आम्हांस गणिलें आहे. ३७ नाहीं नाहीं; ज्यानें आपणांवर प्रीति केली त्याच्या योगें या सर्व गोष्टींत आपण विशेष विजयी आहों. ३८ माझी खातरी आहे कीं मरण, जीवन, देवदूत, अधिपति, वर्तमान, अगर भविष्य अशा गोष्टी, बलें, ३९ आकाश, पाताळ, किंवा कोणतीहि दुसरी सृष्ट वस्तु, ख्रिस्त येशू आपला प्रभु याच्यामध्यें जी देवाची आपल्यावरील प्रीति आहे तिच्यापासून आपल्याला वेगळें करावयास समर्थ होणार नाहीं.

### इस्राएल लोकांचा अविश्वास पाहून पौलाला कळवळा येतो

९ १ मी ख्रिस्तामध्यें सत्य बोलतों, असत्य बोलत नाहीं, माझें मनहि पवित्र आत्म्यामध्यें मजबरोबर साक्ष देतें कीं २ माझ्या अंतःकरणांत मोठा खेद व अखंड वेदना आहेत. ३ कारण माझे बंधुजन म्हणजे देहसंबंधानें माझे गोत्रज ह्यांच्यासाठीं मीं स्वतः ख्रिस्तापासून उत्सृष्ट व्हावें, अशी इच्छा करावीशी वाटली; ४ ते

इस्राएली आहेत; त्यांस दत्तकपणा, ईश्वरी तेज, करारमदार,
शास्त्रदान, उपासना व वचनें हीं आहेत; ५ महान् पूर्व-
जहि त्यांचे आहेत; व त्यांजपासून देहसंबंधानें ख्रिस्त
आहे, तो सर्वांवर आहे; युगानुयुग धन्यवादित देव,
आमेन.

### देवानें दिलेलीं वचनें व्यर्थ झालेलीं नाहींत

६ देवाचें वचन व्यर्थ झालें असें नाहीं, कारण इस्रा-
एलाची संतति सर्व इस्राएल नाहींत; ७ आणि ते अब्रा-
हामाचे संतान आहेत म्हणून ते सर्व त्याचीं मुलेंबाळें
आहेत असें नाहीं, तर 'इसहाकाच्या वंशाला तुझें संतान
म्हणतील;' ८ म्हणजे देहद्वारें झालेलीं मुलेंबाळें देवाचीं
मुलेंबाळें आहेत असें नाहीं; तर वचनाचीं मुलेंबाळेंच
संतान अशीं मोजण्यांत येतात. ९ कारण 'पुढें याच
दिवसांत मी येईन तेव्हां सारेला पुत्र होईल' हें वाक्य
वचनरूप आहे. १० इतकेंच नव्हे, तर रिबकाहि एका-
पासून म्हणजे आपला पूर्वज इसहाक याजपासून गरोदर
राहिल्यावर, ११ मुलें अजून जन्मलीं नव्हतीं, व त्यांनीं
कांहीं बरेंवाईट केलें नव्हतें तेव्हां, देवाचा जो संकल्प
निवडणुकीनें असतो, तो कर्मांमुळें नव्हे, तर पाचारण
करणाऱ्याच्या इच्छेनें कायम राहावा म्हणून, १२ तिला
सांगण्यांत आलें कीं 'वडील धाकट्याची सेवा करील.'
१३ तसेंच 'मीं याकोबावर प्रीति केली, आणि एसावाचा
द्वेष केला,' असाहि शास्त्रलेख आहे.

### देव अन्यायी नाहीं

१४ तर आपण काय म्हणावें? देवाच्या ठायीं अन्याय
आहे काय? असें अगदीं नाहीं. १५ तो मोशाला म्हणतो,
'मी ज्याच्यावर दया करीन त्याच्यावर करीन, आणि
ज्याच्यावर करुणा करीन त्याच्यावर करीन.' १६ हें तर
इच्छा बाळगणाऱ्याकडे नाहीं व धावणाऱ्याकडेहि नाहीं,
तर दया करणारा देव याजकडे आहे. १७ शास्त्रलेख
फारोला असें सांगतो: 'याजकरितां मीं तुला पुढें केलें
आहे कीं तुझ्यावर मीं आपला पराक्रम दाखवावा आणि
माझें नाम सर्व पृथ्वीवर प्रख्यात व्हावें.' १८ यावरून तो
पाहिजे त्याच्यावर दया करितो, आणि पाहिजे त्याला कठीण
करितो.

### देव सर्वाधिपति आहे

१९ ह्यावर तूं मला म्हणशील, तर मग तो कां दोष
लावितो? त्याच्या संकल्पाला कोण आड येतो? २० हे
मानवा, जो तूं देवाला उलटून बोलतोस तो तूं कोण
आहेस? घडलेली वस्तु घडणाऱ्याला, तूं मला असें कां
केलें, असें म्हणेल काय? २१ एकाच गोळ्याचें एक पात्र
उत्तम कामासाठीं व एक हलक्या कामासाठीं करावें असा
कुंभाराला मातीवर अधिकार नाहीं काय? २२ आपला
क्रोध दर्शवावा व आपलें सामर्थ्य व्यक्त करावें असें
देवाच्या मनांत असल्यामुळें नाशासाठीं सिद्ध झालेल्या
क्रोधाच्या पात्रांचें मोठ्या धीरानें त्यानें जर सहन केलें,
२३, २४ यासाठीं कीं ज्या आपल्याला यहूद्यांतून केवळ
नव्हे तर विदेशी लोकांतूनहि पाचारण झालें, त्यांजविषयीं,
म्हणजे त्यानें पूर्वी गौरव करण्यासाठीं सिद्ध केलेल्या
दयेच्या पात्रांविषयीं आपल्या गौरवाची विपुलता कळवावी,
असें असलें, तर काय? २५ तो होशेयाच्या पुस्तकांत
हेंहि म्हणतो,

जे माझे लोक नव्हत त्यांस मी आपले लोक म्हणेन;
आणि जी प्रिय नाहीं तिला प्रिय म्हणेन;
२६ आणि असें होईल कीं तुम्ही माझे लोक नव्हां असें
जेथें म्हणत
तेथें त्यांस जीवंत देवाचे पुत्र असें म्हणतील.
२७ यशायानेंहि इस्राएलाविषयीं उच्च वाणीनें असे उद्गार
काढले आहेत: जरी 'इस्राएल लोकांची संख्या समुद्राच्या
वाळूसारखी आहे, तरी शेष मात्र तारण पावेल; २८
कारण प्रभु आपलें वचन आटोपतें घेऊन व समाप्त करून
पृथ्वीवर सिद्धीस नेईल.' २९ त्याप्रमाणें यशयानें पूर्वीहि
म्हटलें:

जर सेनाधीश प्रभूनें आम्हांसाठीं बीज राहूं दिलें
नसतें,
तर आम्ही सदोमासारखे झालों असतों,
व गमोऱ्याप्रमाणें बनलों असतों.

### नीतिमत्त्व प्राप्त न होण्याचें कारण

३० तर मग आपण काय म्हणावें? असें कीं जे
विदेशी लोक नीतिमत्त्वाच्या मागें लागले नव्हते त्यांस

नीतिमत्त्व, म्हणजे जें नीतिमत्त्व विश्वासद्वारें आहे तें, प्राप्त
झालें; ३१ परंतु इस्राएल लोक नीतिमत्त्वाच्या नियमा-
मागें लागले होते तरी ते त्या नियमापर्यंत जाऊन पोहं-
चले नाहींत. ३२ कां नाहींत ? कारण विश्वासानें नव्हे,
तर कर्मांनीं कार्य होईल असें समजून ते त्याच्या मागें
लागले. त्यांस ठेच लागण्याच्या धोंड्याची ठेच लागली;
३३ असा शास्त्रलेख आहे :

पाहा, मी सीयोनांत ठेच लागण्याचा धोंडा व अड-
खळण्याचा खडक ठेवितों; त्याजवर जो विश्वास ठेवील तो
फजीत होणार नाहीं.

१ बंधुजनहो, त्यांच्याविषयीं माझी मनीषा व
10 देवाजवळ विनंति अशी आहे कीं त्यांचें तारण
व्हावें. २ मी त्यांजविषयीं साक्ष देतों कीं त्यांस
देवाविषयीं आस्था आहे, परंतु ती यथार्थज्ञानाला अनुसरून
नाहीं. ३ कारण त्यांना देवाच्या नीतिमत्त्वाची आणीव
नसल्यामुळें व ते आपलेंच नीतिमत्त्व स्थापावयास पाहत
असल्यामुळें ते देवाच्या नीतिमत्त्वाला वश झाले नाहींत.
४ प्रत्येक विश्वास ठेवणाऱ्याला नीतिमत्त्व प्राप्त होण्यासाठीं
ख्रिस्त नियमशास्त्राची समाप्ति असा आहे.

### नीतिमत्त्वाचा नवा मार्ग सर्वांसाठीं आहे

५ मोशे असें लिहितो: जो मनुष्य नियमशास्त्राचें
नीतिमत्त्व आचरितो तो त्यानें वांचेल; ६ परंतु विश्वासानें
जें नीतिमत्त्व तें म्हणतें: 'तूं आपल्या मनांत म्हणूं नको
कीं ऊर्ध्वलोकीं कोण चढेल ?' (अर्थात् ख्रिस्ताला खालीं
आणावयास) ७ किंवा 'अधोलोकीं कोण उतरेल ?
(अर्थात् ख्रिस्ताला मेलेल्यांतून वर आणावयास.) ८
तर तें काय म्हणतें ? तें वचन तुझ्याजवळ आहे, तुझ्या
तोंडांत व तुझ्या अंतःकरणांत आहे;' जें विश्वासाचें वचन
आम्ही गाजवितों तेंच हें आहे; ९ जर तूं आपल्या मुखानें
येशू प्रभु आहे असें स्वीकारिशील, आणि देवानें त्याला
मेलेल्यांतून उठविलें असा आपल्या अंतःकरणांत विश्वास
धरशील तर तुला तारणप्राप्ति होईल; १० नीतिमत्त्वा-
साठीं विश्वास धरणें अंतःकरणानें होतें, तारणाचा स्वीकार
करणें तोंडानें होतें. ११ शास्त्र म्हणतें, 'जो कोणी
त्याजवर विश्वास ठेवितो तो फजीत होणार नाहीं.' १२
यहूदी व हेल्लेणी यांमध्यें भेद नाहीं; कारण सर्वांचा प्रभु
एकच असून जे त्याचा धांवा करितात त्या सर्वांस पुरवठा
करण्याइतका तो संपन्न आहे; १३ 'जो कोणी प्रभूचें
नाम घेऊन त्याचा धांवा करील त्याचें तारण होईल.'
१४ तर ज्याच्यावर त्यांनीं विश्वास ठेविला नाहीं त्याचा
धांवा ते कसा करितील ? ज्याचें त्यांनीं ऐकलें नाहीं
त्याच्यावर ते विश्वास कसा ठेवितील ? घोषणा करणाऱ्यां-
वांचून ते कसे ऐकतील ? १५ आणि ज्यांना पाठविलें
नाहीं, ते कशी घोषणा करितील ? 'चांगल्या गोष्टींची
सुवार्ता सांगणाऱ्यांचे चरण किती मनोरम दिसतात !'
असा शास्त्रलेख आहे.

१६ तथापि सुवार्तेकडे सर्वांनीं लक्ष दिलें असें नाहीं.
यशया म्हणतो, 'हे प्रभू, आम्हीं ऐकलेल्या वार्तेवर कोणी
विश्वास ठेविला आहे ?' १७ याप्रमाणें विश्वास वार्तेनें व
वार्ता ख्रिस्ताच्या वचनानें होते; १८ पण मी विचारितों,
त्यांनीं ऐकलें नव्हतें काय ? हो, ऐकलें होतें;

त्यांचा नाद सर्व पृथ्वीभर,
व त्यांचे शब्द दिगंतरीं पोंचले.

१९ आणखी मी विचारितों कीं इस्राएलला कळलें
नव्हतें काय ? प्रथम मोशे म्हणतो,

जें राष्ट्र नव्हे त्याच्या योगें मी तुम्हांस ईर्ष्येस पेटवीन,
एका मूढ राष्ट्राच्या योगें मी तुम्हांला चिडवीन;
२० आणि यशया फार धीट होऊन म्हणतो,
जे माझा धांवा करीत नसत त्यांस मी प्राप्त झालों;
ज्यांनीं मजजवळ मागितलें नाहीं
त्यांस मी प्रकट झालों.

२१ इस्राएलाविषयीं तो म्हणतो: 'मी सारा दिवस
आपले हात माझा मोडणाऱ्या व उलटून बोलणाऱ्या
लोकांकडे केले आहेत.'

### ईश्वरानें इस्राएल लोकांचा सर्वस्वी त्याग केलेला नाहीं

१ तर मी विचारितों, देवानें आपल्या लोकांस
11 टाकून दिलें आहे काय ? असें अगदीं नाहीं. कारण
मीहि इस्राएली, अब्राहामाच्या कुळांतला, बन्या-
मीनाच्या वंशांतला आहें. २ देवाला ज्यांविषयीं पूर्वज्ञान

होतें त्या आपल्या लोकांस त्यानें टाकिलें नाहीं. एलीयाच्या
प्रकरणांत शास्त्र काय म्हणतें हें तुम्हांस ठाऊक नाहीं काय?
तो इस्राएलाविरुद्ध देवाजवळ विनंति करितो: ३ 'हे प्रभू,
त्यांनीं तुझ्या संदेष्ट्यांस जिवें मारिलें, तुझ्या वेद्या खणून
पाडिल्या; मी एकटाच राहिलों आहें; आणि माझाहि प्राण
घ्यावयास ते पाहतात;' ४ परंतु देवाचें उत्तर त्याला काय
मिळालें? 'ज्यांनीं बालमूर्तीपुढें गुडघे टेकले नाहींत, अशीं
सात हजार मनुष्यें मीं आपणासाठीं ठेविलीं आहेत.' ५
तसेंच आतांहि कृपेच्या निवडीप्रमाणें शेष राहिलें आहे; ६
आणि जर हें कृपेनें आहे तर कर्मांनीं नाहींच; असलें तर
कृपाहि कृपाच नाहीं. ७ तर काय? जें मिळविण्यासाठीं
इस्राएल खटपट करीत आहे तें त्यास मिळालें नाहीं;
निवडलेल्या लोकांस मिळालें आणि वरकड बधिर झाले. ८
'देवानें त्यांस आजच्या दिवसापर्यंत धुंद बुद्धि, दिसूं न
देणारे डोळे, व ऐकूं न येऊं देणारे कान दिले,' या शास्त्र-
लेखाप्रमाणें झालें. ९ दावीदहि म्हणतो,

त्यांचे मेज त्यांस फास, [सा]पळा, अडखळण व
प्रतिफळ असें होवो.
१० त्यांस दिसूं नये म्हणून
त्यांचे डोळे अंधकारमय होवोत,
आणि तूं त्यांची पाठ सतत वाकीव.

११ तर मी विचारितों, आपलें पतन व्हावें म्हणून ते
अडखळले काय? असें अगदीं नाहीं. तर त्यांस ईर्ष्या
उत्पन्न होण्यासाठीं त्यांच्या उल्लंघनानें विदेशी लोकांस तारण
प्राप्त झालें आहे. १२ आतां त्यांचें उल्लंघन हें जर जगाची
संपत्ति, आणि त्यांचा ऱ्हास हा जर विदेशी लोकांची
संपन्नता आहे; तर त्यांचा भरणा झाल्यास ही किती तरी
अधिक होईल!

### विदेशीयांचा उद्धार-कलम लावण्याचें उदाहरण

१३ तुम्हां विदेशी लोकांस मी हें सांगतों: ज्या अर्थी
मी विदेशी लोकांचा प्रेषित आहें त्या अर्थी मी आपल्या
सेवेला मोठेपणा देतों; १४ यासाठीं कीं कसेंहि करून
माझ्या जातभाईमध्यें ईर्ष्या उत्पन्न करून त्यांच्यांतील
कित्येकांस तारावें. १५ कारण त्यांचा त्याग झाल्यानें
जगाचा समेट होतो तर त्यांचा स्वीकार झाल्यानें मृताव-
स्थेंतून जीवंत होणें याशिवाय काय असेल? १६ प्रथम
विभाग पवित्र ठरल्यास कणकेचा गोळाहि तसाच ठरेल;
आणि मूळ पवित्र, तर फांद्याहि पवित्र आहेत. १७ आतां
जर कांहीं फांद्या तोडून टाकिल्या, आणि तूं रानजैतून
असतां त्यांच्या जागीं कलमरूपें लाविला गेलास व जैतु-
नाच्या पौष्टिक मुळाचा भागीदार झालास; १८ तर फांद्यां-
हून मी अधिक आहें अशी बढाई करूं नको; करशील तर
मुळाला आधार तूं नाहींस, मूळ तुला आधार आहे (हें
लक्षांत ठेव). १९ तूं म्हणशील कीं माझें कलम लावावें
म्हणून फांद्या तोडून टाकिल्या. २० बरें; अविश्वासामुळें
त्या तोडून टाकिल्या आणि विश्वासानें तुझी स्थिति अशी
झाली; तर अहंकारी न होतां भीति बाळग. २१ कारण
जर देवानें मूळच्या फांद्या राखिल्या नाहींत तर तो तुलाहि
राखणार नाहीं. २२ देवाची दया व तीव्रता पाहा; पतन
झालेल्यांविषयीं तीव्रता आणि तुजविषयीं देवाची दया;
पण तूं त्याच्या दयेंत राहशील तर; नाहीं तर तूंहि छेदून
टाकिला जाशील; २३ आणि ते अविश्वासांत न राहिले
तर तेहि कलमरूपें लावण्यांत येतील; कारण त्यांचें पुनः
कलम लावण्यास देव समर्थ आहे. २४ जें मूळचें रानटी
झाड अशा रानजैतुनांतून कापून चांगल्या जैतुनांत सृष्टि-
क्रम सोडून तुझें कलम लाविलें, तर ह्या ज्या त्याच्या
मूळच्याच फांद्या त्या आपल्या जैतुनांत, किती अगत्यानें
कलम लावण्यांत येतील?

### सर्वांवर दया करणें हा देवाचा अंतिम हेतु आहे

२५ बंधुजनहो, तुम्हीं आपणांला शहाणे समजूं नये
म्हणून या गूजाविषयीं तुम्हीं अजाण असावें अशी माझी
इच्छा नाहीं; तें हें कीं विदेशी लोकांचा भरणा आंत होईपर्यंत
इस्राएल लोक अंशतः बधिर झालेले आहेत; २६ नंतर
सर्व इस्राएल लोकांचें तारण होईल; असा शास्त्रलेख आहे:

मुक्त करणारा सीयोनांतून येईल;
तो याकोबापासून अधर्म दूर करील;
२७ जेव्हां मी त्यांचीं पापें हरण करीन
तेव्हां त्यांजबरोबर हाच माझा करार आहे.

२८ तुमच्या बाजूनें पाहतां सुवार्तेसंबंधानें ते शत्रु
आहेत; परंतु निवडणुकीच्या संबंधानें पूर्वजांमुळें प्रिय

आहेत. २९ कारण देवाला आपल्या कृपादानांचा व पाचा-
रणाचा अनुताप होत नाहीं. ३० असें पूर्वी तुम्ही देवाची
अवज्ञा करीत होतां; परंतु आतां तुम्हांस त्यांच्या आज्ञा-
भंगानें दया प्राप्त झाली आहे, ३१ त्याप्रमाणें तुम्हांवरील
दयेनें त्यांनाहि आतां दया प्राप्त व्हावी म्हणून त्यांनीं आतां
आज्ञाभंग केला आहे. ३२ सर्वांवर दया करावी म्हणून
देवानें सर्वांस आज्ञाभंगाच्या स्वाधीन करून ठेविलें आहे.
३३ अहाहा, देवाची संपत्ति, बुद्धि व ज्ञान हीं किती
अगाध आहेत! त्याचे संकल्प किती दुर्ज्ञेय आणि त्याचे
मार्ग किती अनुपलक्ष्य आहेत! ३४ 'प्रभूचें मन कोणीं
ओळखलें आणि त्याचा मंत्री कोण होता? ३५ त्याला
प्रथम देऊन त्याची फेड मिळेल असा कोण आहे?' ३६
त्याजपासून, त्याच्या द्वारें व तदर्थ सर्व आहे.
त्याला युगानुयुग गौरव असो. आमेन.

### नवीन जीवितक्रम

१२ १ यास्तव बंधुजनहो, मी देवाच्या करुणांमुळें
तुम्हांस विनवितों कीं तुम्हीं आपल्या शरीरांचा
जीवंत, पवित्र व देवाला प्रिय असा यज्ञ करावा;
ही तुमची आध्यात्मिक सेवा आहे. २ या युगाबरोबर सम-
रूप होऊं नका; तर आपल्या मनाच्या नवीकरणानें
स्वतःचें रूपांतर होऊं द्या, यासाठीं कीं देवाची जी उत्तम,
ग्रहणीय व परिपूर्ण इच्छा, ती काय आहे हें समजून घ्यावें.

### आध्यात्मिक दानांचा योग्य उपयोग

३ मला प्राप्त झालेल्या कृपादानावरून मी तुम्हांतील
प्रत्येकाला सांगतों कीं मानावयास योग्य त्यापेक्षां स्वतःला
अधिक मानूं नका; तर देवानें प्रत्येकाला वांटून दिलेल्या
विश्वासाच्या परिमाणाप्रमाणें मर्यादेनें आपणांला माना. ४
कारण जसें आपणांला एक शरीर असून त्यांत पुष्कळ
अवयव आहेत, तरी त्या सर्व अवयवांचा व्यापार एकच
नाहीं, ५ तसें आपण ख्रिस्तामध्यें एकच शरीर आणि प्रत्येक
एकमेकांचे अवयव असे आहों, ६ आपल्याला प्राप्त
झालेल्या कृपेच्या मानानें निरनिराळीं कृपादानें आहेत,
म्हणून ईश्वरी संदेश देणें तो विश्वासाच्या परिमाणानें द्यावा;
७ सेवा करितांना सेवेंत तत्पर असावें; जो शिक्षक आहे त्यानें
शिक्षण देण्यांत, ८ बोध करणारानें बोध करण्यांत तत्पर असावें;
दान देणारानें निष्काम बुद्धीनें द्यावें; अधिकाऱ्यानें आपलें
काम आस्थेनें करावें; दया करणारानें ती संतोषानें करावी.

### ख्रिस्ती जीवितक्रमाचे नियम

९ प्रीति ढोंगावांचून असावी. वाइटाचा वीट मानणारे;
बऱ्याला चिकटून राहणारे; १० ममतेनें एकमेकांवर बंधु-
प्रीति करणारे; आदरसत्कार करण्यांत एकमेकांमध्यें पुढाकार
घेणारे; ११ आस्थेविषयीं मंद नसणारे; आत्म्यांत उत्सुक;
प्रभूची सेवा करणारे; १२ आशेनें हर्षित; संकटांत सहन-
शील; प्रार्थनेंत तत्पर; १३ पवित्र जनांच्या गरजा भागवि-
णारे; आतिथ्य करण्यांत तत्पर; असे व्हा. १४ तुमचा छळ
करणाऱ्यांस आशीर्वाद द्या, आशीर्वादच द्या, शाप देऊं नका.
१५ आनंद करणाऱ्यांबरोबर आनंद करा; आणि रडणा-
ऱ्यांबरोबर रडा. १६ परस्पर एकचित्त असा. मोठमोठ्या
गोष्टींवर चित्त ठेवूं नका, तर लीनतेच्या गोष्टींनीं ओढले जा.
आपणांला शहाणे समजूं नका. १७ वाइटाबद्दल वाईट अशी
कोणाची फेड करूं नका. सर्व मनुष्यांसमक्ष सात्त्विकपणा
राखण्याकडे लक्ष ठेवा. १८ साधेल तर सर्व मनुष्यांबरोबर
आपणांकडून शांतीनें राहा. १९ प्रिय बंधूंनो, सूड उगवूं
नका, तर देवाच्या क्रोधाला वाट द्या; कारण 'सूड घेणें
मजकडे आहे, मी फेड करीन, असें प्रभु म्हणतो. २०
तुझा शत्रु भुकेला असल्यास त्याला खावयाला दे; तान्हेला
असल्यास त्याला प्यावयाला पाणी दे; कारण असें केल्यानें
तूं त्याच्या मस्तकावर निखाऱ्यांची रास करिशील,' असे
शास्त्रलेख आहेत. २१ वाइटानें जिंकला जाऊं नको तर
बऱ्यानें वाइटाला जिंक.

### अधिकाऱ्यांच्या आज्ञापालनाबाबत सूचना

१३ १ प्रत्येक जणानें वरिष्ठ अधिकाऱ्यांस मान्य
असावें; कारण देवापासून नाहीं असा अधिकारच
नाहीं; जे अधिकारी आहेत ते देवानें नेमिलेले
आहेत. २ यास्तव जो अधिकाराला आड येतो तो देवाच्या
व्यवस्थेस आड येतो; आणि आड येणाऱ्यांस दंड प्राप्त
होईल. ३ चांगल्या कामास अधिकाऱ्यांची भीति आहे असें
नाहीं तर वाईट कामास आहे. तर अधिकाराची भीति
नसावी अशी तुझी इच्छा आहे काय? योग्य तें कर म्हणजे
त्याच्या योगें तुझी वाहवा होईल; ४ कारण तुझ्या हिता-

साठीं तो देवाचा सेवक आहे; तरी जें वाईट तें तूं केल्यास
त्याची भीति बाळगा; कारण तो तरवार व्यर्थ धारण कर-
णारा नव्हे; तर क्रोध दाखविण्याकरितां वाईट करणाराचा
सूड घेणारा असा तो देवाचा सेवक आहे. ५ यास्तव
क्रोधामुळें केवळ नाहीं, तर मनाच्या विवेकामुळें आज्ञेंत
राहणें अगत्य आहे. ६ या कारणास्तव तुम्ही करहि देतां;
कारण ते देवाची सेवा करणारे आहेत, व ते याच सेवेंत
तत्पर असतात. ७ ज्यांचें देणें त्या सर्वांस भरून द्या;
ज्याला कर त्याला कर, ज्याला जकात त्याला जकात, ज्याला
भय त्याला भय, ज्याला सन्मान त्याला सन्मान द्या.

### बंधुप्रेम

८ एकमेकांवर प्रीति करणें याशिवाय कोणाचे ऋणी
असूं नका; कारण जो दुसऱ्यावर प्रीति करितो तो नियम-
शास्त्र पूर्णपणें पाळितो. ९ व्यभिचार करूं नको, मनुष्यहत्त्या
करूं नको, चोरी करूं नको, लोभ धरूं नको, या आज्ञांचा
आणि दुसरी कांहीं आज्ञा असली तर तिचाहि सारांश,
‘ जशी आपणावर तशी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर, ’
या वचनांत आहे. १० प्रीति शेजाऱ्याचें कांहीं वाईट
करीत नाहीं म्हणून प्रीति ही नियमशास्त्र पूर्णपणें पाळणें आहे.

### ख्रिस्तदिनाचें आगमन

११ समय ओळखून हें करा, कारण तुम्हीं आतां झोपें-
तून उठावें अशी वेळ आली आहे; आपण विश्वास ठेविला
तेव्हांपेक्षां तारण आतां आपल्याजवळ आलें आहे. १२
रात्र सरत येऊन दिवस जवळ आला आहे; म्हणून
आपण अंधकाराचीं कर्में टाकून द्यावीं, आणि प्रकाशाची
शस्त्रसामुग्री धारण करावी. १३ दिवसाढवळ्यां साजेल
असें आपण शिष्टाचारानें चालावें. दंगलांत व मद्याच्या
धुंदींत, विलासांत व कामासक्तींत, कलहांत व मत्सरांत
नसावें; १४ तर तुम्ही प्रभु येशू ख्रिस्ताला परिधान करा,
आणि देहवासना तृप्त करण्यासाठीं तरतूद करूं नका.

### विश्वासांत दुर्बळ असलेल्यांशीं सहिष्णुता

१४ १ जो विश्वासानें दुर्बल त्याचा स्वीकार करा,
तरी विकल्पांच्या निर्णयांकरितां नका. २ कोणा-
एकाचा विश्वास असा आहे कीं त्याला कोणतेंहि
खाणें निषिद्ध नाहीं, परंतु जो दुर्बळ तो शाकभाजीच खातो.
३ जो खातो त्यानें न खाणाऱ्याला तुच्छ मानूं नये, जो
खात नाहीं त्यानें खाणाऱ्याला दोषी ठरवूं नये; कारण
देवानें त्याचा स्वीकार केला आहे. ४ दुसऱ्याच्या चाकराला
दोषी ठरविणार तूं कोण आहेस? त्याचें स्थिर राहणें किंवा
पतन होणें हें त्याच्या धन्याचें पाहणें आहे. त्याला स्थिर
करण्यांत येईल; कारण प्रभु त्याला स्थिर करण्यास समर्थ
आहे. ५ कोणी मनुष्य एकादा दिवस दुसऱ्या दिवसापेक्षां
अधिक मानितो; कोणी सर्व दिवस सारखे मानितो. तर
प्रत्येकानें आपल्या मनाची पूर्ण खातरी करून घ्यावी.
६ जो दिवस पाळितो तो प्रभूकरितां पाळितो, आणि
जो खातो तो प्रभूकरितां खातो; कारण तो देवाचें उप-
कारस्मरण करितो; जो खात नाहीं तो प्रभूकरितां खात
नाहीं आणि तोहि देवाचें उपकारस्मरण करितो. ७ कारण
आपल्यांतील कोणी स्वतःकरितां जगत नाहीं, आणि कोणी
स्वतःकरितां मरत नाहीं. ८ आपण जगतों ते प्रभूकरितां
जगतों; आणि आपण मरतों ते प्रभूकरितां मरतों; म्हणून
आपण जगलों किंवा मेलों, तरी प्रभूचे आहों; ९ ख्रिस्त
यासाठीं मृत्यु पावला व पुनः जीवंत झाला कीं त्यानें
मेलेल्यांचा व जिवंतांचाहि प्रभु असावें. १० तर तूं आपल्या
भावाला दोषी कां ठरवितोस? किंवा तूं आपल्या भावाला
तुच्छ कां मानितोस? आपण सर्व देवाच्या न्यायासनासमोर
उभे राहावयाचे आहों.
११ कारण

प्रभु म्हणतो, जर मी जीवंत आहें
तर मजपुढें प्रत्येक जण गुडघा टेकील,
व प्रत्येक जिव्हा देवाचें स्तवन करील,

असा शास्त्रलेख आहे. १२ तर मग आपणांतील प्रत्येक
जण स्वतःचा हिशेब देवाला देईल.

१३ याकरितां आपण यापुढें एकमेकांला दोषी ठरवूं
नये; तर असें ठरवून टाकावें कीं कोणी आपल्या भावापुढें
कांहीं ठेचाड किंवा अडखळण ठेवूं नये. १४ मला ठाऊक
आहे, आणि प्रभु येशूमध्यें माझी खातरी आहे, कीं
कोणताहि पदार्थ मूळचा निषिद्ध नाहीं; तथापि अमुक पदार्थ
निषिद्ध आहे, असें समजणाऱ्याला तो निषिद्धच आहे. १५
तुझ्या भावाला अन्नामुळें दुःख झालें तर तूं प्रीतीनें

वागतनासा झाला आहेस. ज्यासाठीं ख्रिस्त मरण पावला
त्याचा नाश आपल्या अन्नानें करूं नको. १६ जें तुम्हांमध्यें
उत्तम आहे त्याची निंदा होऊं नये. १७ खाणें व पिणें यांत
देवाचें राज्य नाहीं, तर नीतिमत्त्व, शांति व पवित्र
आत्म्याच्या द्वारा मिळणारा आनंद यांत आहे. १८ अशा
प्रकारें जो ख्रिस्ताची सेवा करितो तो देवाला प्रिय व
मनुष्यांस पसंत आहे. १९ तर मग जेणेंकरून शांति व
परस्परांची अभिवृद्धि होईल अशा गोष्टींच्या मागें आपण
लागावें. २० अन्नामुळें देवाच्या कामाचा मोड करूं नका.
सर्व पदार्थ शुद्धच आहेत; परंतु जो खाण्यामुळें अड-
खळतो त्याला तें पाप आहे. २१ मांस न खाणें, द्राक्षारस न
पिणें, आणि जेणेंकरून तुझा भाऊ ठेचाळतो [ किंवा अड-
खळतो अगर अशक्त होतो ] तें न करणें हें चांगलें. २२
तुझ्या ठायीं जो विश्वास आहे तो तूं देवासमक्ष आपणा-
जवळ ठेव. आपणाला जें कांहीं पसंत आहे त्याविषयीं
ज्याला स्वतःचा न्यायनिवाडा करावा लागत नाहीं तो धन्य;
२३ पण संशय धरून जो खातो तो दोषी ठरतो, कारण
त्याचें खाणें विश्वासानें होत नाहीं; आणि जें कांहीं विश्वा-
सानें नाहीं तें पाप आहे.

१५ १ आपण जे सबळ आहों त्या आपण दुर्ब-
ळांची दुर्बळता सोशिली पाहिजे; आपल्याच
सुखाकडे पाहूं नये. २ आपल्यांतील प्रत्येकानें
शेजाऱ्यास सुखी करणें तें त्याचें बरें करून अभिवृद्धि
होण्यासाठीं करावें. ३ कारण ख्रिस्तानें तरी स्वसुखाकडे
पाहिलें नाहीं; तर 'तुझी निंदा करणाऱ्यांनीं केलेली निंदा
मजवर आली', या शास्त्रलेखाप्रमाणें झालें. ४ जें कांहीं
शास्त्रांत पूर्वीं लिहिलें तें सर्व आपणांस शिक्षण मिळण्या-
करितां लिहिलें, यासाठीं कीं शास्त्रापासून मिळणाऱ्या सहन-
शीलतेच्या व समाधानाच्या योगें आपल्याला आशा प्राप्त
व्हावी. ५ आतां सहनशीलता दाखविणारा व समाधान
देणारा देव असें करो कीं ख्रिस्त येशूप्रमाणें तुम्हीं परस्परें
एकचित्त व्हावें, ६ यासाठीं कीं आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताचा
पिता जो देव याचें एकमतानें व एकमुखानें तुम्हीं गौरव
करावें. ७ जसा ख्रिस्तानें देवाच्या गौरवाकरितां आपला
स्वीकार केला, तसा तुम्हीही एकमेकांचा स्वीकार करा.
८,९ मी असें म्हणतों कीं देवाच्या सत्याकरितां म्हणजे पूर्व-
जांस दिलेलीं वचनें खरीं करण्याकरितां, आणि विदेशी
लोकांनीं त्याच्या दयेमुळें देवाचें गौरव करावें याकरितां,
ख्रिस्त सुंता झालेल्या लोकांचा सेवक झाला;

यास्तव विदेशी लोकांमध्यें मी तुझें स्तवन करीन,
व तुझ्या नामाचें स्तोत्र गाईन,
असा शास्त्रलेख आहे.
१० विदेश्यांनो, त्याच्या प्रजेबरोबर जयजयकार करा,
असा एक लेख आहे.
११ सर्व विदेश्यांनो, परमेश्वराचें स्तवन करा;
आणि सर्व लोक त्याचें स्तवन करोत,
असेंहि शास्त्रांत सांगितलें आहे.
१२ आणखी, यशया म्हणतो,
इशायाचा धुमारा फुटेल,
तो विदेश्यांवर अधिकार करावयास उभा राहील;
त्याजवर विदेशी आशा ठेवितील.

१३ आतां आशेचा देव तुम्हांस विश्वास धरण्यांत
सर्वथैव हर्षभरित व शांतिपूर्ण करो, असें कीं तुम्हांला
पवित्र आत्म्याच्या सामर्थ्यानें विपुल आशा प्राप्त व्हावी.

### पौलाला प्रशस्तपणानें लिहिण्याचें कारण

१४ बंधुजनहो, तुम्ही चांगुलपणानें भरलेले, सर्व ज्ञान-
संपन्न व एकमेकांस बोध करावयाला समर्थ आहां अशी
तुम्हांविषयीं मला स्वतःची खातरी आहे; १५ तरी देवा-
पासून मला प्राप्त झालेल्या कृपादानामुळें मीं तुम्हांला
आठवण देऊन ठिकठिकाणीं विशेष प्रशस्तपणें लिहिलें आहे;
१६ तें कृपादान असें कीं मीं विदेश्यांसाठीं देवाची सुवार्ता
सांगणें हें याजकपण चालवीत ख्रिस्त येशूची सेवा करणारा
व्हावें, यासाठीं कीं विदेशी लोक हें अर्पण, पवित्र आत्म्यानें
पवित्र केलेलें व सुग्राह्य व्हावें. १७ यावरून देवाच्या
संबंधानें ख्रिस्त येशूविषयीं मला अभिमान आहे. १८, १९
ख्रिस्तानें माझ्या हातून न घडविलेलें असें कांहीं सांगण्याचें
धाडस मी करणार नाहीं; तर त्यानें विदेशी लोकांची
मान्यता मिळविण्याकरितां माझ्या शब्दांनीं व कृतींनीं,
चिन्हें व अद्भुतें यांच्या सामर्थ्यानें, पवित्र आत्म्याच्या
सामर्थ्यानें जें जें घडविलें तेंच सांगतों; तें असें कीं

यरुशलेमापासून इल्लूरिकमापर्यंत आसपास मीं ख्रिस्ताची सुवार्ता पूर्णपणें सांगितली; २० आणि दुसऱ्याच्या पायावर रचूं नये म्हणून, ज्या ठिकाणीं ख्रिस्ताचें नाम घेतात तेथें नाहीं, तर

२१ ज्या लोकांस त्याची वार्ता सांगितली नाहीं
ते पाहतील,
ज्यांनीं ऐकली नाहीं ते समजतील,
या शास्त्रलेखाप्रमाणें सुवार्ता सांगण्याची माझी हौस होती.

## पौलाचे पुढील बेत

२२ यामुळें मला तुम्हांकडे येण्यास बहुत वेळां अडथळा झाला; २३ परंतु आतां या प्रांतांत मला ठिकाण राहिलें नाहीं, आणि मला पुष्कळ वर्षे तुम्हांकडे येण्याची उत्कंठा आहे, २४ म्हणून मी स्पेन देशांत जाईन, तेव्हां येईन (कारण) तिकडे जातांना तुम्हांस भेटावें आणि तुमच्या समागमानें कांहींसें मन भरल्यावर तुम्हीं मला तिकडे बोळवावें अशी माझी इच्छा आहे); २५ सध्यां तर मी पवित्र जनांच्या सेवेंतच यरुशलेमास जातों. २६ कारण यरुशलेमांतील पवित्र जनांतल्या गोरगरिबांसाठीं मासेदोनिया व अखया यांनीं वर्गणी करण्याची मेहरबानी केली आहे. २७ त्यांनीं मेहेरबानी केली तरी ते त्यांचे ऋणी आहेत; कारण विदेशी लोक त्यांच्या आध्यात्मिक गोष्टींचे अंशभागी झाले आहेत, म्हणून ऐहिक गोष्टींत त्यांची सेवा करण्यास ते त्यांचे ऋणी आहेत. २८ यास्तव त्यांस ही फलप्राप्ति करून देऊन कार्य आटोपल्यावर मी तुम्हांला भेटून स्पेन देशांत जाईन; २९ आणि जेव्हां मी तुम्हांकडे येईन तेव्हां ख्रिस्ताचा पूर्ण आशीर्वाद घेऊन येईन हें मला ठाऊक आहे.

३० बंधुजनहो, आपल्या प्रभु येशू ख्रिस्तामुळें व आत्म्याच्या प्रेमामुळें मी तुम्हांस विनंति करितों कीं मजसाठीं देवाजवळ प्रार्थना करण्यांत मजबरोबर खटपट करा; ३१ यासाठीं कीं यहूदीयांत जे अश्रद्धावान् इसम आहेत त्यांजपासून माझी सुटका व्हावी, आणि यरुशलेमासाठीं माझी जी सेवा ती पवित्र जनांस मान्य व्हावी; ३२ अशी कीं मीं देवाच्या इच्छेनें तुम्हांजवळ आनंदानें येऊन तुम्हांबरोबर विश्रांति घ्यावी. ३३ आतां शांतीचा देव तुम्हां सर्वांबरोबर असो. आमेन.

## पौलाचे मित्रमंडळीला नमस्कार

१६ १ किंख्रियांतील मंडळीची सेविका म्हणजे आपली बहीण फीबी इची मी तुम्हांस ओळख करून देतों; २ यासाठीं कीं तुम्ही पवित्र जनांस योग्य असा तिचा प्रभूमध्यें स्वीकार करावा, आणि ज्या कोणत्याहि कामांत तिला तुमची गरज लागेल त्यांत तिला साहाय्य करावें; कारण ती स्वतः पुष्कळ जणांची व माझीहि साहाय्यकारिणी अशी ठरून चुकली आहे.

३ ख्रिस्त येशूमध्यें माझे सहकारी, प्रिस्क व अक्विला यांस सलाम सांगा; ४ त्यांनीं तर माझ्या जिवाकरितां आपला जीव धोक्यांत घातला; त्यांचे आभार केवळ मीच मानितों असें नाहीं, तर विदेशी लोकांच्या सर्व मंडळ्याहि मानितात. ५ जी मंडळी त्यांच्या घरीं आहे तिलाहि सलाम सांगा. माझा प्रिय अपैनत ह्याला सलाम सांगा; तो ख्रिस्तासाठीं आसिया देशाचें प्रथम फळ आहे. ६ मरीयेस सलाम सांगा; तिनें तुम्हांसाठीं फार श्रम केले आहेत. ७ माझे नातलग व सोबतीचे बंदिवान अंद्रोनीक व युनिया यांस सलाम सांगा; ते प्रेषितांमध्यें नामांकित आहेत व माझ्यापूर्वींच ख्रिस्तामध्यें होते. ८ प्रभूमध्यें माझा प्रिय आंप्लियात याला सलाम सांगा. ९ ख्रिस्तामध्यें आमचा सहकारी उर्बान व माझा प्रिय स्ताखु यांस सलाम सांगा, १० ख्रिस्तामध्यें पटलेला अपिल्लेस याला सलाम सांगा. अरिस्तबूलच्या घरांतील माणसांस सलाम सांगा. ११ माझा मातलग हेरोदियोन याला सलाम सांगा. नार्किसाच्या घरांतील माणसें प्रभूमध्यें आहेत त्यांस सलाम सांगा १२ प्रभूमध्यें श्रम करणाऱ्या त्रुफैना व त्रुफोसा यांस सलाम सांगा. प्रिय पर्सिस इला सलाम सांगा; तिनें प्रभूमध्यें फार श्रम केले. १३ प्रभूमध्यें निवडलेला रूफ याला आणि मला मातेसमान अशी जी त्याची आई तिलाहि सलाम सांगा. १४ असुंक्रित, फ्लगोन, हर्मेस, पत्रबास, हर्मास यांस व त्यांजबरोबर जे भाऊ आहेत त्यांस सलाम सांगा. १५ फिललग व युलिया, नीरिय व त्याची बहीण, व ओलुंपास यांस व त्यांजबरोबर जे पवित्र

१ मुळांत : आपली मान पुढें केली.

जन आहेत त्या सर्वांस सलाम सांगा. १६ पवित्र चुंबनानें
एकमेकांस सलाम करा. ख्रिस्ताच्या सर्व मंडळ्या तुम्हांस
सलाम सांगतात.
१७ आतां बंधुजनहो, मी तुम्हांस विनंति करितों कीं
तुम्हांला जें शिक्षण मिळालें आहे त्याविरुद्ध जे फुटी व
अडथळे आणणारे त्यांजवर लक्ष ठेवा; आणि त्यांजपासून
दूर असा. १८ कारण तसले लोक आपल्या प्रभु ख्रिस्ताची
सेवा करीत नाहींत, तर आपल्या पोटाची करितात; आणि
गोड व लाघवी भाषणानें भोळ्यांच्या अंतःकरणास
भुलवितात. १९ तुमचें आज्ञापालन सर्वांस प्रसिद्ध झालें
आहे, म्हणून तुम्हांविषयीं मी आनंद मानितों; तरी जें बरें
आहे त्यासंबंधानें तुम्हीं शहाणे असावें आणि वाइटापासून
अलिप्त असावें, अशी माझी इच्छा आहे. २० शांतीचा
देव सैतानाला तुमच्या पायांखालीं लौकर तुडवील.
आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताची कृपा तुम्हांसह असो.
२१ माझा सहकारी तीमथ्य, व माझे नातलग लूक्य
यासोन व सोसिपतेर तुम्हांस सलाम सांगतात. २२ हें
पत्र लिहून देणारा मी तर्तिय तुम्हांस प्रभूमध्यें सलाम
सांगतों. २३ माझें व सर्व मंडळीचें आतिथ्य करणारा
गायस याचा तुम्हांस सलाम. नगराचा खजीनदार एरास्त
व भाऊ क्वर्त यांचा तुम्हांस सलाम. २४ [ आपला प्रभु
येशू ख्रिस्त याची कृपा तुम्हां सर्वांवर असो. आमेन. ]

### ईशस्तवन

२५, २६, २७ आतां माझ्या सुवार्तेप्रमाणें व जें गूज
युगानयुग गुप्त ठेविलेलें होतें, परंतु आतां प्रकट झालें
आहे आणि सर्व राष्ट्रांतील लोकांस त्यांनीं विश्वासाधीन
व्हावें म्हणून सनातन देवाच्या आज्ञेनें संदेष्ट्यांच्या
लेखांच्या द्वारें कळविलें आहे, त्या गूजाच्या प्रकटी-
करणाप्रमाणें, येशू ख्रिस्ताविषयींच्या घोषणेप्रमाणें तुम्हांस
स्थिर करण्यास समर्थ जो केवळ एकच ज्ञानी देव, त्याला
येशू ख्रिस्ताच्या द्वारें युगानयुग गौरव असो. आमेन.

# पौलाचें करिंथकरांस पहिलें पत्र



### नमस्कार व ईशोपकारस्मरण

१ करिंथांत असलेल्या देवाच्या मंडळीस, म्हणजे
१ ख्रिस्त येशूमध्यें पवित्र केलेल्या व पवित्र जन
होण्यास बोलाविलेल्या लोकांस, आणि आपला प्रभु येशू
ख्रिस्त, म्हणजे त्यांचा व आपलाहि प्रभु, याचें नाम सर्व
ठिकाणीं घेणाऱ्या सर्वांस, २ देवाच्या इच्छेनें येशू ख्रिस्ताचा
प्रेषित होण्यास बोलाविलेला पौल व आपला भाऊ
सोस्थनेस यांजकडून: ३ देव आपला पिता व प्रभु येशू
ख्रिस्त यांजपासून तुम्हांस कृपा व शांति असो.
४ ख्रिस्त येशूमध्यें तुम्हांवर झालेल्या देवाच्या अनुग्र-
हामुळें मी सर्वदा तुम्हांविषयीं आपल्या देवाचें उपकार-
स्मरण करितों; ५, ६ तो अनुग्रह हा कीं जसजशी
ख्रिस्ताविषयींची साक्ष तुम्हांमध्यें दृढ झाली तसतसे तुम्ही
त्याच्या ठायीं प्रत्येक बाबींत सर्व बोलण्यांत व सर्व ज्ञानांत
संपन्न झालां; ७ असें कीं आपला प्रभु येशू ख्रिस्त याच्या
प्रकट होण्याची वाट पाहणारे तुम्ही कोणत्याहि कृपादानांत
उणे पडलां नाहीं. ८ आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या
दिवशीं तुम्हीं अदूष्य ठरावें एतदर्थ तोच शेवटपर्यंत
तुम्हांस दृढ करून ठेवील. ९ ज्यानें स्वपुत्र येशू ख्रिस्त
आपला प्रभु याच्या सहभागित्वांत तुम्हांस बोलाविलें, तो
देव विश्वसनीय आहे.

### ख्रिस्ती मंडळींत पक्षाभिमानाची वृत्ति

१० बंधुजनहो, आपला प्रभु येशू ख्रिस्त याच्या नामानें
मी तुम्हांस विनंति करितों कीं तुम्हीं सर्वांनीं सारखेंच
बोलावें, म्हणजे तुम्हांत फुटी होऊं नयेत; तुम्हीं एक-
चित्तानें व एकमतानें यथास्थित व्हावें. ११ बंधुजनहो,

तुम्हांमध्यें कलह आहेत, असें मला ख्लोवेच्या लोकांकडून
कळलें आहे. १२ माझें म्हणणें असें आहे कीं, तुम्हांतील
प्रत्येक जण म्हणतो, मी पौलाचा, मी अपुल्लोसाचा, मी केफाचा.
आणि मी ख्रिस्ताचा आहें. १३ ख्रिस्ताचे असे विभाग झाले
आहेत काय ? पौलाला तुम्हांसाठीं वधस्तंभावर खिळविलें
होतें काय ? पौलाच्या नामांत तुमचा बाप्तिस्मा झाला काय ?
१४ क्रिस्प व गायस यांजशिवाय मीं तुम्हांतील कोणाचा
बाप्तिस्मा केला नाहीं, म्हणून मी देवाचे आभार मानितों.
१५ हें यासाठीं झालें कीं तुमचा बाप्तिस्मा माझ्या नामांत
झाला असें कोणीं म्हणूं नये. १६ मीं स्तेफनाच्या घरच्या-
चाहि बाप्तिस्मा केला; त्यांच्याखेरीज मीं दुसऱ्या कोणाचा
बाप्तिस्मा केला कीं नाहीं हें माझ्या लक्षांत नाहीं. १७
ख्रिस्तानें मला बाप्तिस्मा करावयास नाहीं, तर सुवार्ता
सांगावयास पाठविलें; पण ख्रिस्ताचा वधस्तंभ व्यर्थ होऊं
नये म्हणून वाक्चातुर्यानें ती सांगण्यास पाठविलें नाहीं.

### वधस्तंभाच्या ठायीं असलेलें सामर्थ्य

१८ कारण ज्यांचा नाश होत आहे त्यांस वधस्तंभा-
विषयींचें शिक्षण मूर्खपण आहे; तरी ज्यांस तारण प्राप्त
होत आहे असा आपणांस तें देवाचें सामर्थ्य आहे. १९ मी
ज्ञान्यांचें ज्ञान नष्ट करीन, व बुद्धिमंतांची बुद्धि व्यर्थ
करीन, असा शास्त्रलेख आहे. २० या युगाचे ‘ ज्ञानी,
शास्त्री, वाद करणारे ’ कोठें आहेत ? देवानें जगाचें ‘ ज्ञान
मूर्खपणाचें ठरविलें ’ कीं नाहीं ? २१ कारण जग देवाच्या
ज्ञानानें वेष्टित असतां त्याला आपल्या ज्ञानाच्या योगानें
देवाला ओळखतां आलें नाहीं, तेव्हां गाजविलेल्या
वार्तेच्या मूर्खपणाच्या योगें विश्वास ठेवणाऱ्या लोकांचें तारण
करणें देवाला योग्य वाटलें; २२ कारण यहूदी चिन्हें मागत
असतां, व हेल्लेणी ज्ञानाचा शोध करीत असतां, २३ आम्ही
वधस्तंभावर खिळलेला ख्रिस्त गाजवितों; हा यहूद्यांस अड-
खळण व हेल्लेण्यांस मूर्खपण आहे; २४ परंतु पाचारण
झालेल्या यहूदी व हेल्लेणी अशा दोघांसहि तो देवाचें
सामर्थ्य व देवाचें ज्ञान असा ख्रिस्त आहे. २५ कारण
देवाची जी मूर्खपणाची कृति ती मनुष्यांपेक्षां ज्ञानाची आहे;
आणि देवाची जी अशक्तपणाची कृति ती मनुष्यांपेक्षां
शक्तीची आहे.

२६ बंधुजनहो, तुम्हांस झालेलें पाचारण पाहा, तुम्हां-
मध्यें संसारदृष्ट्या ज्ञानी, समर्थ, कुलीन असे फार नाहींत,
२७ तरी ज्ञान्यांस लाजवावें म्हणून देवानें जगांतील जें
मूर्खपणाचें तें निवडिलें, आणि बलवानांस लाजवावें म्हणून
देवानें जें दुर्बल तें निवडिलें; २८ आणि जगांतील जें
कुलहीन, धिक्कारलेलें व शून्यवत् अशांस देवानें याकरितां
निवडिलें कीं जें आहे तें त्यानें निरर्थक करावें; २९ आणि
देवासमोर कोणीहि मनुष्यजातीच्या प्राण्यानें आढ्यता
मिरवूं नये. ३० त्याकडून तुम्ही ख्रिस्त येशूमध्यें आहां, तो
देवापासून आपल्याला ज्ञान, नीतिमत्त्व, पवित्रीकरण व
पापविमोचन असा झाला; ३१ यासाठीं कीं ‘ जो अभिमान
बाळगितो त्यानें तो प्रभूविषयीं बाळगावा ’ या शास्त्रलेखा-
प्रमाणें व्हावें.

### तत्त्वज्ञान व प्रकटीकरण

२ १ बंधुजनहो, मी तुम्हांकडे आलों तो वक्तृत्वाच्या
व ज्ञानाच्या श्रेष्ठतेनें देवाचें गूज तुम्हांस सांगत आलों
असें नाहीं. २ कारण येशू ख्रिस्त, म्हणजे वधस्तंभावर
खिळलेला येशू ख्रिस्त; याशिवाय तुम्हांमध्यें दुसरें कांहीं
जमेस धरूं नये असा मीं निश्चय केला; ३ आणि मी
तुम्हांजवळ अशक्त, भयभीत व अति कंपित असा झालों.
४ माझें भाषण व माझी घोषणा हीं ज्ञानयुक्त अशा मन
वळविणाऱ्या शब्दांचीं नव्हतीं तर आत्मा व सामर्थ्य यांच्या
प्रतिपादनाचीं होतीं, ५ यासाठीं कीं तुमचा विश्वास मानवी
ज्ञानानें नव्हे तर देवाच्या सामर्थ्यानें असावा.

६ जे पोक्त आहेत त्यांमध्यें आम्ही ज्ञान सांगतों; पण
तें ज्ञान या युगाचें नव्हे, आणि या युगाचे नाहींसे होणारे
अधिकारी यांचेंहि नव्हे; ७ तर दैवी ज्ञानाचें रहस्य आम्ही
सांगतों; तें गुप्त ठेविलेलें होतें, तें युगांच्या पूर्वी तुमच्या-
आमच्या गौरवाकरितां देवानें नेमिलें; ८ तें या युगांतल्या
अधिकाऱ्यांतील कोणालाहि कळत नाहीं; त्यांना कळलें
असतें तर त्यांनीं गौरवाच्या प्रभूला वधस्तंभावर खिळिलें
नसतें;
९ हें तर या शास्त्रलेखाप्रमाणें आहे :
डोळ्यानें पाहिलें नाहीं, कानानें ऐकलें नाहीं,
व माणसाच्या मनांत आलें नाहीं,

तें आपणावर प्रीति करण्याऱ्यांसाठीं
देवानें सिद्ध केलें आहे;

१० परंतु देवानें तें स्वतःच्या आत्म्याच्या द्वारें आप-
ल्याला प्रकट केलें, कारण आत्मा हा सर्व गोष्टींचा व
देवाच्या रहस्यांचाहि शोधक आहे. ११ मनुष्याचा आत्मा
जो मनुष्यांत असतो, त्याशिवाय मनुष्यांतील गोष्टी कोण
ओळखतो ? तशा देवाच्या गोष्टी देवाच्या आत्म्याशिवाय
कोणीहि ओळखत नाहीं. १२ आपल्याला जगाचा आत्मा
नव्हे, तर देवापासून जो आत्मा आहे तो मिळाला; यासाठीं
कीं जें देवानें आपल्याला कृपेनें दिलें तें आपण ओळखून
घ्यावें. १३ तें आम्ही मानवी ज्ञानानें शिकविलेल्या शब्दांनीं
नव्हे तर आत्म्यानें शिकविलेल्या शब्दांनीं,आध्यात्मिक गोष्टीं-
बरोबर आध्यात्मिक गोष्टी जुळवून सांगतों. १४ दैहिक
मनुष्य देवाच्या आत्म्याच्या गोष्टी स्वीकारीत नाहीं, कारण
त्या त्याला मूर्खपणाच्या वाटतात; आणि त्याच्यानें त्या
ओळखवत नाहींत कारण त्यांची पारख आत्म्याच्या
योगें होते. १५ जो आत्मिक आहे तो तर सर्व गोष्टी
पारखितो, तरी त्याची स्वतःची पारख कोणाकडूनहि होत
नाहीं. १६ ‘ प्रभूचें मन असें कोणीं ओळखिलें कीं त्यानें
त्याला शिकवावें ?’ आपल्याला तर ख्रिस्ताचें मन आहे.

## पक्षाभिमानी वृत्तीचा निषेध

३ १ बंधुजनहो, जसें आत्मिकांबरोबर बोलावें तसें
तुम्हांबरोबर माझ्यानें बोलवलें नाहीं, तर जसें दैहि-
कांबरोबर, जसें ख्रिस्तांतील बालकांबरोबर, तसें
बोलावें लागलें. २ मीं तुम्हांस दूध पाजिलें, अन्न दिलें
नाहीं; कारण त्या वेळेस तुम्हांस शक्ति नव्हती, आणि
अजूनहि नाहीं; ३ तुम्ही अजूनहि दैहिक आहां; तुमच्यांत
हेवा व कलह हीं आहेत; त्यावरून तुम्ही दैहिक आहां कीं
नाहीं ? तुम्ही मानवी रीतीनें चालतां कीं नाहीं ? ४ कारण
कोणी म्हणतो, मी पौलाचा आहें; आणि दुसरा एक
म्हणतो, मी अपुल्लोसाचा आहें; तेव्हां तुम्ही मानवच आहां
कीं नाहीं ? ५ अपुल्लोस कोण आहे ? आणि पौल कोण
आहे ? ज्यांच्या द्वारें तुम्हीं विश्वास ठेविला, असे ते सेवक
आहेत; ज्याला त्याला प्रभूनें दिल्याप्रमाणें केवळ ते
आहेत. ६ मीं लाविलें, अपुल्लोसानें पाणी घातलें, पण
देवानें वाढविलें. ७ यास्तव लावणारा कांहीं नाहीं, आणि
पाणी घालणाराहि कांहीं नाहीं; तर वाढविणारा देव हाच
कायतो आहे. ८ लावणारा व पाणी घालणारा हे एकच
आहेत, तरी प्रत्येकाला आपापल्या श्रमाप्रमाणें आपापली
मजुरी मिळेल. ९ कारण आम्ही देवाचे सहकारी आहों.
तुम्ही देवाचें शेत, देवाची इमारत असे आहां.

## शिक्षणाची जबाबदारी

१० मजवर झालेल्या देवाच्या अनुग्रहाच्या मानानें
मीं चतुर कारागिरासारिखा पाया घातला, आणि दुसरा
त्यावर बांधितो; तर प्रत्येकानें आपण त्यावर कसें बांधितों
याविषयीं जपावें. ११ घातलेला पाया असा जो येशू
ख्रिस्त त्यावांचून दुसरा पाया कोणाला घालतां येत नाहीं.
१२ या पायावर कोणी सोनें, रुपें, मोलवान् पाषाण,
लाकूड, गवत, पेंढा यांनीं बांधितो; १३ तर बांधणाऱ्या
प्रत्येकाचें काम उघड होईल; तो दिवस तें उघडकीस
आणील; कारण तो अग्नीसह असा प्रकट होईल आणि
प्रत्येकाचें काम कसें आहे याची परीक्षा अग्नि करील. १४
ज्या कोणाचें त्यावर बांधलेलें काम टिकेल त्याला मजुरी
मिळेल. १५ ज्या कोणाचें काम जळून जाईल, त्याचा तोटा
होईल, तथापि तो स्वतः तरेल; परंतु जणू काय अग्नींतून
बाहेर पडलेल्यासारखा तरेल.

१६ तुम्ही देवाचें मंदिर आहां, आणि तुम्हांमध्यें
देवाचा आत्मा वसतो हें तुम्हांस ठाऊक नाहीं काय ? १७
जर कोणी देवाच्या मंदिराचा नाश करितो तर देव त्याचा
नाश करील; कारण देवाचें मंदिर पवित्र असतें, तसेच
तुम्ही आहां.

१८ कोणी स्वतःला फसवून घेऊं नये; तुम्हांपैकीं जो
कोणी सांप्रतच्या युगदृष्ट्या आपण ज्ञानी आहों असें सम-
जतो त्यानें ज्ञानी होण्याकरितां मूर्ख व्हावें. १९ कारण या
जगाचें ज्ञान देवासमोर मूर्खपण आहे; ‘तो ज्ञान्यांस
त्यांच्याच धूर्तपणांत धरितो ’ असा शास्त्रलेख आहे; २०
आणि ‘प्रभु ज्ञान्यांचे विचार असे ओळखतो कीं ते व्यर्थ
आहेत,’ असा दुसरा शास्त्रलेख आहे. २१ यास्तव मनुष्यां-
विषयीं कोणीं प्रतिष्ठा मिरवूं नये. सर्व कांहीं तुमचें
आहे; २२ पौल, अपुल्लोस, केफा, जग, जीवन, मरण,

वर्तमान, भविष्य, हीं सर्व तुमचीं आहेत; २३ तुम्ही
ख्रिस्ताचे; आणि ख्रिस्त देवाचा.

### प्रेषित देवाला जबाबदार

४ १ आम्ही ख्रिस्ताचे सेवक व देवाच्या गूजांचे
कारभारी आहों असे आम्हांला मानावें. २ कारभारी
म्हटला तर तो विश्वासू असला पाहिजे. ३ तर तुम्हां-
कडून किंवा मानवी न्यायाधीशाकडून माझा न्यायनिवाडा
व्हावा. याचेंहि मला कांहीं वाटत नाहीं, मी स्वतःचा
देखील न्यायनिवाडा करीत नाहीं; ४ कारण जरी माझें
मन माझ्याविरुद्ध मला साक्ष देत नाहीं, तरी त्यावरून
मी निर्दोष ठरतों असें नाहीं; माझा न्यायनिवाडा करणारा
प्रभु आहे. ५ यास्तव त्या समयापूर्वी म्हणजे प्रभूच्या
येण्यापूर्वी तुम्ही न्यायनिवाडा करूंच नका; तो अंधारां-
तील गुप्त गोष्टी प्रकाशित करील, आणि अंतःकरणांतील
संकल्पहि उघड करील; त्या वेळीं ज्याची त्याला देवा-
कडून वाहवा प्राप्त होईल.
६ बंधुजनहो, मीं तुम्हांकरितां या गोष्टी अन्योक्तीनें
स्वतःला व अपुल्लोसाला लावून घेतल्या आहेत; यासाठीं
कीं शास्त्रलेखापलीकडे कोणीं जाऊं नये हा नियम आम्हां-
वरून तुम्हीं शिकावा; म्हणजे तुम्हांपैकीं कोणीहि एक
दुसऱ्यावर फुगणार नाहीं. ७ तुला श्रेष्ठत्व कोणीं दिलें?
आणि जें तुला दिलेलें नाहीं असें तुझ्याजवळ काय आहे?
तुला दिलेलें असतां, दिलेलें नाहीं अशी प्रतिष्ठा कां मिर-
वितोस? ८ इतक्यांतच तुम्ही तृप्त झालां आहां, इतक्यां-
तच धनवान् झालां आहां, आम्हांला सोडून तुम्ही तर राजे
बनलां आहां; तुम्ही राजे बनलां असतांच तर ठीक झालें
असतें, कारण आम्हांलाहि तुम्हांबरोबर राजपद प्राप्त झालें
असतें. ९ कारण मला वाटतें, देवानें आम्हां प्रेषितांस
शेवटच्या जागेचे आणि मरणास नेमलेल्यांसारखे असें
पुढें ठेविलें आहे, कारण आम्ही जगाला म्हणजे देव-
दूतांला व मनुष्यांला खेळ असे झालों आहों. १०
आम्ही ख्रिस्तामुळें मूर्ख, तुम्ही ख्रिस्तामध्यें शहाणे; आम्ही
अशक्त, तुम्ही सशक्त; तुम्ही प्रतिष्ठित, आम्हीं अप्र-
तिष्ठित असे आहों. ११ या घटकेपर्यंत आम्ही भुकेले,
तान्हेले व उघडे आहों; आम्ही टोले खातों, आम्हांला
घरदार नाहीं; १२ आम्ही आपल्या हातांनीं काम करून
श्रम करितों; आमची निर्भर्त्सना होत असतां आशीर्वाद
देतों; आमची छळणूक होत असतां ती सहन करितों;
१३ आमची निंदा होत असतां आम्ही मनधरणी करितों;
आम्ही जगाचा गाळ, सर्वांची खरवड असे आजपर्यंत
झालों आहों.

### पितृतुल्य बोध व सूचना

१४ हें मी तुम्हांस लाजविण्यासाठीं लिहीत नाहीं, तर
माझ्या प्रिय मुलांप्रमाणें तुम्हांस बोध करण्यासाठीं लिहितों.
१५ कारण तुम्हांस ख्रिस्तामध्यें दहा हजार गुरु असले तरी
पुष्कळ बाप नाहींत; मीं तर तुम्हांस ख्रिस्त येशूमध्यें
सुवार्तेच्या योगानें जन्म दिला आहे. १६ यास्तव मी
तुम्हांस विनंति करितों कीं माझें अनुकरण करणारे व्हा.
१७ या कारणास्तव प्रभूमध्यें माझा प्रिय व विश्वासू पुत्र
तीमथ्य याला मीं तुम्हांकडे पाठविलें आहे; मी सर्वत्र
प्रत्येक मंडळींत शिकवितों त्याप्रमाणें ख्रिस्तांतील माझ्या
शिक्षणपद्धतीची आठवण तो तुम्हांस देईल. १८ मी
तुम्हांकडे येत नाहीं असें समजून कित्येक फुगले आहेत.
१९ तरी प्रभूची इच्छा असली तर मी तुम्हांकडे लवकर
येईन; तेव्हां फुगलेल्यांच्या बोलण्याकडे पाहणार नाहीं,
त्यांच्या सामर्थ्याकडे पाहीन. २० कारण देवाचें राज्य
बोलण्यांत नाहीं, सामर्थ्यांत आहे. २१ तुम्हांला कोणतें
पाहिजे? मीं तुम्हांकडे काठी घेऊन यावें किंवा प्रीतीनें व
सौम्यतेच्या आत्म्यानें यावें?

### भयंकर स्वरूपाच्या अनीतीचें एक उदाहरण

५ १ तुम्हांमध्यें प्रत्यक्ष जारकर्म चालू आहे अशी
खबर मला मिळाली आहे; तसलें जारकर्म विदेशी
लोकांत देखील आढळत नाहीं, अशा प्रकारचें तें आहे;
म्हणजे तुम्हांतील कोणीएकानें आपल्या बापाची बायको
राखिली आहे. २ तरी तुम्ही फुगलां आहां, त्यापेक्षां हें
कर्म करणारा आपणांतून घालविला जावा असें म्हणून
शोकाकुल व्हावयाचें असतें. ३ मी शरीरानें अविद्यमान
तरी आत्म्यानें विद्यमान आहें आणि विद्यमान असल्या-
सारिखा मी निर्णय करून चुकलों आहें. ४,५ तो असा

कीं ज्यानें अशा प्रकारें हें कर्म केलें त्या मनुष्याला तुम्हीं
व आपल्या प्रभु येशूच्या सामर्थ्यानें युक्त असा माझा
आत्मा यांनीं एकत्र मिळून आपला प्रभु येशू याच्या नामानें
देहस्वभावाच्या नाशाकरितां सैतानाच्या स्वाधीन करावें,
यासाठीं कीं आत्मा प्रभु येशूच्या दिवशीं तरावा. ६ हें
तुमचें आढ्यता मिरविणें शोभत नाहीं. थोडें खमीर
सगळ्या गोळ्याला फुगवितें, हें तुम्हांस ठाऊक नाहीं काय?
७ तर जुनें खमीर काढून टाका, यासाठीं कीं तुम्ही जसें
बेखमीर लोक आहां तसें तुम्हीं नवा गोळा व्हावें, कारण
आपला वल्हांडणाचा ‘ यज्ञपशु ’ जो ख्रिस्त त्याचें ‘ अर्पण
झालें; ’ ८ यास्तव जुन्या खमिरानें, अगर वाईटपणा व
दुष्टपणा, यांच्या खमिरानें नव्हे, तर सात्विकपणा व
खरेपणा या बेखमीर भाकरींनीं आपण सण करावा.

९ तुम्हीं जारकर्म्यांची संगत धरूं नये, असें मीं तुम्हांस
आपल्या पत्रांत लिहिलें होतें; १० तथापि या जगाचे
जारकर्मी, लोभिष्ठ, वित्त हरण करणारे, व मूर्तिपूजक
यांची संगत मुळींच धरूं नये असें माझें म्हणणें नाहीं;
कारण ती मुळींच न धराल तर तुम्हांस जगांतून निघून
जावें लागेल. ११ यास्तव तुम्हांस जें लिहिलें होतें त्याचा
अर्थ असा कीं, बंधु म्हटलेला असा कोणी जारकर्मी,
लोभी, मूर्तिपूजक, चहाड, मद्यपी, किंवा वित्त हरण
करणारा असला तर तशाची संगत धरूं नये; त्याच्या
पंक्तीस बसूं नये. १२ कारण जे बाहेर आहेत त्यांचा
न्याय करणें मजकडे कोठें आहे ? जे आंत आहेत त्यांचा
न्याय तुम्ही करीत नाहीं काय ? १३ जे बाहेर आहेत
त्यांचा न्याय देव करीत नाहीं काय ? ‘ तुम्ही आपणांमधून
त्या दुष्टाला बाहेर घालवा. ’

### ख्रिस्ती लोकांचीं कोर्टांत नेलेलीं भांडणें

१ तुम्हांतील कोणाएकाचा दुसऱ्याबरोबर वाद
६ असला, तर तो आपला खटला पवित्र जनांपुढें न
आणितां अधार्मिकांपुढें नेण्याचें कसें धाडस करितो ?
२ पवित्र जन हे जगाचा न्यायनिवाडा करितील हें तुम्हांस
ठाऊक नाहीं काय ? तुम्हांपुढें जगाचा न्यायनिवाडा
व्हावयाचा आहे, तर तुम्ही अगदीं हलक्या खटल्यांच्या
न्यायसभा होण्यास अयोग्य आहां काय ? ३ आपण
देवदूतांचा न्यायनिवाडा करूं हें तुम्हांस ठाऊक नाहीं
काय ? तर मग व्यावहारिक गोष्टींविषयीं सांगणें नकोच.
४ तुम्हांस व्यावहारिक खटल्यांचा न्यायनिवाडा करावयाचा
आहे, तर जे मंडळींत गणतीचे नाहींत त्यांस कसे नेमतां ?
५ तुम्हांस लाज वाटावी म्हणून मी हें सांगतों. ज्याच्यानें
भावाभावांची पंचाईत करवेल असा एकहि शहाणा मनुष्य
तुम्हांमध्यें नाहीं, असें आहे काय ? ६ भाऊ भावावर
फिर्याद करितो, आणि तीहि विश्वास न ठेवणाऱ्यांपुढें
करितो. ७ तुम्ही एकमेकांवर खटले करितां ह्यांत सर्व
प्रकारें तुमची हानिच आहे; त्यापेक्षां तुम्ही अन्याय
कां सोसून घेत नाहीं ? त्यापेक्षां नाडणूक कां सोसून
घेत नाहीं ? ८ उलट तुम्ही स्वतः अन्याय
व नाडणूक करितां, आणि ती आपल्या बंधुजनांची करितां.
९ अनीतिमान् मनुष्याला देवाच्या राज्याचें वतन मिळणार
नाहीं हें तुम्हांस ठाऊक नाहीं काय ? फसूं नका; जारकर्मी,
मूर्तिपूजक, व्यभिचारी, चैनबाज, पुंमैथुनकारी, १० चोर,
लोभी, मद्यपी, चहाड, व वित्त हरण करणारे यांस
देवाच्या राज्याचें वतन मिळणार नाहीं; ११ आणि तुम्हां-
पैकीं कित्येक तसे होते; तरी तुम्ही प्रभु येशू ख्रिस्ताच्या
नामांत व आपल्या देवाच्या आत्म्यांत धुतलेले, पवित्र
केलेले, व नीतिमान् ठरविलेले, असे झालां आहां.

### अशुद्धता ही ख्रिस्ती मनुष्याच्या जीवन-क्रमाशीं विसंगत होय

१२ सर्व गोष्टींची मला मोकळीक आहे, तरी सर्व
गोष्टी हितकारक असतात असें नाहीं; सर्व गोष्टींची मला
मोकळीक आहे, तरी मी कोणत्याहि गोष्टीच्या स्वाधीन
होणार नाहीं. १३ अन्न पोटासाठीं व पोट अन्नासाठीं
आहे; त्या दोहोंचा देव अंत करील. शरीर जारकर्मासाठीं
नाहीं, तर प्रभूसाठीं आहे; आणि शरीरासाठीं प्रभु आहे
१४ देवानें प्रभूला उठविलें, आणि तो आपल्या सामर्थ्यानें
आपल्याला उठवील. १५ तुमचीं शरीरें ख्रिस्ताचे अवयव
आहेत, हें तुम्हांस ठाऊक नाहीं काय ? मीं ख्रिस्ताचे
अवयव नेऊन ते कसबिणीचे अवयव करावे काय ? असें
न होवो. १६ जो कसबिणीला जडला तो व ती हीं एक-
शरीर आहेत, हें तुम्हांस ठाऊक नाहीं काय ? कारण

'तीं दोघें एकदेह होतील' असें तो म्हणतो. १७ जो
प्रभूला जडला तो व प्रभु एक आत्मा आहे. १८
जारकर्मापासून दूर राहा. जें कांहीं दुसरें पापकर्म मनुष्य
करितो तें शरीराबाहेरून होतें; परंतु जो जारकर्म करितो
तो आपल्या शरीरासंबंधानें पाप करितो. १९ तुमचें
शरीर, तुम्हांमध्यें वसणारा जो पवित्र आत्मा देवापासून
तुम्हांस मिळाला आहे त्याचें मंदिर आहे हें तुम्हांस ठाऊक
नाहीं काय ? आणि तुम्ही आपले नव्हां; २० कारण तुम्ही
मोलानें विकत घेतलेले आहां; यास्तव तुम्ही आपल्या
शरीरानें देवाचें गौरव करा.

## विवाह, ब्रह्मचर्य व सोडचिठ्ठी यांविषयींचे प्रश्न

१ तुम्ही मला ज्या गोष्टींविषयीं लिहिलें त्यां-
७ विषयीं: पुरुषानें स्त्रीला शिवूं नये हें त्याला बरें,
२ तरी जारकर्में होत आहेत म्हणून प्रत्येक पुरुषाला
स्वतःची स्त्री असावी, आणि प्रत्येक स्त्रीला स्वतःचा पति
असावा. ३ नवऱ्यानें बायकोला तिचा हक्क द्यावा; आणि
त्याप्रमाणें बायकोनेंहि नवऱ्याला द्यावा. ४ बायकोला
स्वतःच्या शरीरावर अधिकार नाहीं तर नवऱ्याला आहे;
आणि त्याप्रमाणें नवऱ्यालाहि स्वतःच्या शरीरावर अधिकार
नाहीं तर बायकोला आहे. ५ एकमेकांबरोबर वंचना करूं
नका, तरी प्रार्थनेसाठीं प्रसंग मिळावा म्हणून पाहिजे
असल्यास तो कांहीं वेळ सम्मतीनें करा, मग फिरून एकत्र
व्हा, यासाठीं कीं सैतानानें तुमच्या असंयमामुळें तुम्हांस
परीक्षेंत पाडूं नये. ६ तरी मी हें आज्ञा म्हणून सांगत
नाहीं, तर परवानगी म्हणून सांगतों. ७ मी जसा आहें
तसें सर्वांनींहि असावें अशी माझी इच्छा आहे; तरी
प्रत्येकाला त्याचें त्याचें कृपादान देवापासून मिळालें आहे,
एकाला एका प्रकारचें व दुसऱ्याला दुसऱ्या प्रकारचें.

८ जे अविवाहित व ज्या विधवा आहेत त्यांस मी
म्हणतों कीं तुम्ही मजसारिखीं राहिलां तर तें तुम्हांस बरें;
९ तथापि जर त्यांस संयम होत नाहीं तर त्यांनीं लग्न
करावें, कारण जळण्यापेक्षां लग्न करणें बरें आहे. १०
विवाहितांस मी आज्ञा करितों, मी नव्हें तर प्रभु करितो,
कीं बायकोनें नवरा सोडूं नये, ११ ( सोडिला तर तिनें
लग्न केल्यावांचून राहावें, किंवा नवऱ्याबरोबर समेट
करावा; ) आणि नवऱ्यानें बायको सोडूं नये. १२
दुसऱ्यांस मी म्हणतों, प्रभु म्हणत नाहीं; जर कोणाएका
भावाला विश्वासहीन बायको आहे, आणि ती त्याच्या-
जवळ नांदावयास कबूल आहे, तर त्यानें तिला सोडूं नये.
१३ ज्या बायकोला विश्वासहीन नवरा असून तो तिच्या-
जवळ राहावयास कबूल आहे, तिनें त्याला सोडूं नये.
१४ कारण बायकोच्या द्वारें विश्वासहीन नवरा पवित्र
झाला आहे आणि बंधूच्या द्वारें विश्वासहीन बायको पवित्र
झाली आहे; असें नसतें तर तुमचीं मुलेंबाळें अशुद्ध
असतीं; परंतु आतां तीं पवित्र आहेत. १५ तथापि जर
विश्वासहीन व्यक्ति वेगळी होऊं पाहते तर ती वेगळी
होवो; अशा प्रसंगीं भाऊ किंवा बहीण बांधलेली नाहीं;
देवानें आपल्याला शांतींत राहण्याकरितां पाचारण केलें
आहे. १६ हे पत्नी, तूं आपल्या पतीला तारशील किंवा
नाहीं, हें तुला काय ठाऊक ? हे पते, तूं आपल्या पत्नीला
तारशील किंवा नाहीं, हें तुला काय ठाऊक ? १७ तर
जसें प्रत्येकाला प्रभूनें वांटून दिलें आहे, जसें प्रत्येकाला
देवानें पाचारण केलें आहे, तसें त्यानें चालावें, आणि
याप्रमाणें मी सर्व मंडळ्यांस नेमून देतों. १८ सुंता
झालेल्या कोणा मनुष्यास पाचारण झालें तर त्यानें बेसुंती
होऊं नये; कोणा बेसुंती मनुष्यास पाचारण झालें तर
त्यानें सुंता करून घेऊं नये. १९ सुंता कांहीं नाहीं व
बेसुंताहि कांहीं नाहीं, तर देवाच्या आज्ञा पाळणें हेंच
कायतें सर्व आहे. २० ज्या स्थितींत असतां कोणास
पाचारण झालें तींत त्यानें राहावें. २१ तूं दास
असतां तुला पाचारण झालें काय ? त्याची चिंता
करूं नको; मोकळा होतां येत असलें तरी तसाच राहा.
२२ कारण दास असून ज्याला प्रभूमध्यें पाचारण झालें,
तो दास्यांतून मोकळा केलेला प्रभूचा मनुष्य आहे; तसेंच
मोकळें असतांना ज्याला पाचारण झालें तो ख्रिस्ताचा दास
आहे. २३ तुम्ही मोलानें विकत घेतलेले आहां; मनुष्यांचे
दास होऊं नका. २४ बंधुजनहो, ज्या स्थितींत ज्याला
पाचारण झालें त्या स्थितींत तो देवाजवळ राहो.

१ म्हणजे ख्रिस्तावर विश्वास न ठेवणारी.

२५ कुमारिकांविषयीं मला प्रभूची आज्ञा नाहीं, तथापि
ज्या मजवर विश्वासू होण्याची दया प्रभूद्वारें झाली आहे
तो मी आपलें मत सांगतों: २६ तें असें कीं, प्रस्तुतच्या
अडचणीमुळें जो ज्या स्थितींत आहे त्या स्थितींत त्यानें
राहावें हें मनुष्याला बरें. २७ तूं बायकोला बांधलेला
आहेस काय? आहेस तर मुक्त होण्यास पाहूं नको;
बायकोपासून मुक्त आहेस काय? आहेस तर
बायको करण्यास पाहूं नको. २८ तथापि
तूं लग्न केलें असलें तरी पाप केलें नाहीं, आणि
कुमारिकेनें लग्न केलें असलें तरी तिनें पाप केलें नाहीं;
तरी पण अशांवर संसारांत संकट येईल; आणि मी तर
तुमचें रक्षण व्हावें अशी इच्छा बाळगतों. २९ बंधुजनहो,
मी हेंच म्हणतों, काळाचा संक्षेप करण्यांत आला आहे,
यासाठीं कीं यापुढें ज्यांस बायका आहेत त्यांनीं त्या
नसल्यासारिखें असावें; ३० जे रडतात त्यांनीं आपण रडत
नसल्यासारिखें, जे आनंद करितात त्यांनीं आपण आनंद
न केल्यासारिखें; जे विकत घेतात त्यांनीं आपणांजवळ
कांहीं नसल्यासारिखें; ३१ व जे या जगाचा उपयोग
करितात त्यांनीं आपण त्याचा उपयोग करीत
नसल्यासारिखें असावें; कारण या जगाचें रूपांतर
होत आहे. ३२ तुम्हीं निश्चिंत असावें अशी माझी
इच्छा आहे. अविवाहित पुरुष, प्रभूला कसें संतोषवावें,
अशी प्रभूच्या गोष्टींविषयींची चिंता करितो. ३३
परंतु विवाहित पुरुष, आपल्या बायकोला कसें संतोषवावें,
अशी जगाच्या गोष्टींविषयींची चिंता करतो. ३४
विवाहित व अविवाहित स्त्री यांच्यामध्येंहि भेद आहे.
अविवाहित असते ती आपण शरीरानें व आत्म्यानेंहि
पवित्र व्हावें, अशी प्रभूच्या गोष्टींविषयींची चिंता करित्ये;
परंतु विवाहित असते ती आपण आपल्या नवऱ्याला कसें
संतोषवावें अशी जगाच्या गोष्टींविषयींची चिंता करित्ये.
३५ हें मी तुमच्याच हितासाठीं सांगतों; तुम्हांवर फास
टाकण्यासाठीं नाहीं, तर तुमच्या हातून उत्तम आचरण व
प्रभूची सेवा एकाग्रतेनें व्हावी म्हणून सांगतों; ३६ परंतु
जर कोणाला असें वाटतें कीं आपण आपल्या कुमारिकेच्या
अपमानास कारण होतों, ती उपवर झाली आहे आणि
तसें अगत्यच आहे, तर जशी इच्छा असेल तसें त्यानें
करावें; तो पाप करीत नाहीं; तीं लग्न करोत. ३७ तथापि
जो अंतःकरणानें स्थिर आहे, ज्याला अगत्य नाहीं, ज्याची
आपल्या इच्छेवर सत्ता आहे, आणि आपल्या कुमारिकेला
तसेंच ठेवावें असें ज्यानें आपल्या अंतःकरणांत ठरविलें
आहे, तो बरें करितो. ३८ जो आपल्या कुमारिकेचें लग्न
करून देतो तो बरें करितो पण जो लग्न करून देत नाहीं तो
अधिक बरें करितो. ३९ नवरा जीवंत आहे तोंपर्यंत
बायको बांधलेली आहे; नवरा मेल्यावर तिची इच्छा असेल
त्याबरोबर, पण केवळ प्रभूमध्यें लग्न करावयाला ती मोकळी
आहे; ४० जर ती तशीच राहील तर माझ्या समजुतीप्रमाणें
ती अधिक सुखी होईल; मला वाटतें मलाहि देवाचा आत्मा
आहे.

## मूर्तीला दाखविलेला नैवेद्य ह्याविषयीं

१ आतां मूर्तींच्या नैवेद्याविषयीं: आपल्या सर्वांस
८ ज्ञान आहे हें आपल्याला ठाऊक आहे. ज्ञान फुगवितें,
प्रीति वृद्धि करिते. २ जर कोणाला वाटतें कीं आप-
ल्याला एखादी गोष्ट कळते तर ज्याप्रमाणें कळलें पाहिजे
त्याप्रमाणें त्याला अद्याप कळत नाहीं. ३ जर कोणी देवा-
वर प्रेम करितो तर देवाला त्याची ओळख झालेली असते.
४ आतां मूर्तींचे नैवेद्य खाण्यासंबंधानें आपल्याला ठाऊक
आहे कीं जगांत देवाची म्हणून मूर्तिच नाहीं; आणि एका-
खेरीज दुसरा देव नाहीं. ५ कारण ज्यांला देव म्हणतात
असे स्वर्गांत किंवा पृथ्वीवर असले, आणि असे बहुत देव व
बहुत प्रभु आहेत, ६ तरी आपणांला एकच देव म्हणजे
पिता आहे, त्याजपासून अवघीं आहेत, व आपण त्याच्या-
साठीं आहों; आणि आपल्याला एकच प्रभु येशू ख्रिस्त
आहे, त्याच्या द्वारें अवघीं आहेत व आपण त्याच्या द्वारें
आहों.

## दुर्बल बंधूच्या मनाची चलबिचल होऊं नये म्हणून खबरदारी

७ तथापि हें ज्ञान सर्वांच्या ठायीं असतें असें नाहीं;
तर कित्येकांवर मूर्तींच्या सवयीचा संस्कार अजून राहि-
ल्यामुळें ते लोक मूर्तीचा तो नैवेद्य म्हणून खातात; तेव्हां
त्यांचें मन दुर्बल असल्यामुळें तें विटाळतें. ८ आपली

योग्यायोग्यता भक्ष्यानें देवापुढें ठरत नाहीं; न खाण्यानें आपण कमी होत नाहीं आणि पिण्यानें आपण अधिक होत नाहीं. ९ तरी ही तुमची मोकळीक दुर्बळांस अडखळण्याचें कारण होऊं नये म्हणून जपा. १० कारण ज्ञानवान् असा जो तूं त्या तुला मूर्तींच्या देवळांत जेवावयास बसलेलें कोणीं पाहिलें तर, तो दुर्बळ असल्यास, त्याच्या मनांत मूर्तीचा नैवेद्य खाण्याचें धाडस करण्याचें येईल ना? ११ याप्रमाणें जो दुर्बळ, ज्याच्यासाठीं ख्रिस्त मरण पावला असा बंधु, त्याचा तुझ्या त्या ज्ञानाच्या योगें नाश होतो. १२ बंधूंविरुद्ध असें पाप करून व त्यांच्या दुर्बळ मनाला धक्का देऊन तुम्ही ख्रिस्ताविरुद्ध पाप करितां. १३ यास्तव भक्ष्यामुळें आपल्या बंधूला अडखळण होतें तर मीं त्याला अडखळवूं नये म्हणून मी मांस कधींच खाणार नाहीं.

## आपल्या स्वतःच्या हक्कावर पाणी सोडून पौलानें घालून दिलेलें उदाहरण

९ १ मी स्वतंत्र नाहीं काय? मी प्रेषित नाहीं काय? आपला प्रभु येशू याला मीं पाहिलें नाहीं काय? प्रभूमध्यें माझें काम तुम्ही नाहीं काय? २ जरी मी दुसऱ्यांस प्रेषित नाहीं तरी निदान तुम्हांस तरी आहें; कारण प्रभूमध्यें माझ्या प्रेषितपणाचा शिक्का तुम्ही आहां. ३ माझी चौकशी करणाऱ्यांस माझें उत्तर हेंच आहे. ४ आम्हांस खाण्यापिण्याचा हक्क नाहीं काय? ५ इतर प्रेषित, प्रभूचे भाऊ व केफा यांच्यासारिखें आम्हांसहि आपली बायको झालेल्या ख्रिस्ती बहिणीला बरोबर नेण्याचा हक्क नाहीं काय? ६ अथवा धंदा केल्यावांचून उपजीवन करण्याचा हक्क मला व बर्णबाला मात्र नाहीं काय? ७ आपल्या खर्चानें शिपाईगिरी करितो, असा कोण आहे? द्राक्षमळा लावून त्याचें फळ खात नाहीं, असा कोण आहे? कळप पाळून कळपाचें दूध खात नाहीं असा कोण आहे? ८ मी मनुष्याच्या रिवाजाप्रमाणें हें बोलतों काय? नियमशास्त्रहि हेंच सांगत नाहीं काय? ९ मोशाच्या नियमशास्त्रांत असें लिहिलें आहे कीं, ‘ बैल मळणी करितो तेव्हां त्याला मुसकें घालूं नको; ’ ही चिंता देव बैलांची करितो काय? १० किंवा तो आपल्याकरितांच बोलतो? हो, हें आपल्याकरितां लिहिलें होतें; अशा अर्थानें कीं जो नांगरतो त्यानें आशेनें नांगरावें, आणि जो मळणी करितो त्यानें ती उपभोग घेण्याच्या आशेनें करावी. ११ आम्हीं तुम्हांसाठीं आध्यात्मिक वस्तूंची पेरणी केली तर आम्हीं तुमच्या ऐहिक वस्तूंची कापणी केल्यास त्यांत कांहीं मोठी गोष्ट आहे काय? १२ दुसरे जर तुम्हांवरच्या या हक्काचा उपभोग घेतात तर तो आम्ही विशेषेंकरून घ्यावा कीं नाहीं? तथापि हा हक्क आम्हीं बजाविला नाहीं, तर ख्रिस्ताच्या सुवार्तेला कांहीं अडचण करूं नये म्हणून आम्ही सर्व सोशितों. १३ मंदिरांत सेवा करणारे मंदिरांतलें उत्पन्न खातात आणि वेदीजवळ सेवा करणारे वेदीचे भागीदार आहेत, हें तुम्हांस ठाऊक नाहीं काय? १४ त्याप्रमाणें प्रभूनें नेमिलें आहे कीं जे सुवार्ता सांगतात त्यांनीं सुवार्तेवर आपलें उपजीवन करावें. १५ मीं तर यांतील कोणतेंहि केलें नाहीं; व याप्रमाणें मला प्राप्त व्हावें म्हणून मीं हें लिहिलें नाहीं; कारण हा स्वाभिमान कोणीं व्यर्थ करावा यापेक्षां मीं मरावें हें बरें. १६ जरी मी सुवार्ता सांगतों तरी मला प्रतिष्ठा मिरविण्याचें कारण नाहीं; ती सांगणें मला प्राप्त आहे; मी सुवार्ता सांगत नाहीं तर मला धिक्कार असो. १७ मी हें आपण होऊन करितों तर मला वेतन मिळेल, आणि आपण होऊन करीत नाहीं तरी मला कारभार सोपला आहे. १८ तर मग माझें वेतन काय? हेंच कीं सुवार्ता ही मीं फुकट सांगावी, यासाठीं कीं मीं सुवार्तेविषयींचा आपला हक्क पूर्णपणें चालवूं नये.

## लोकांना ख्रिस्तपक्षाचे करण्याचे कामीं त्याची आस्था

१९ मी सर्वांपासून स्वतंत्र असतांहि अधिक लोक प्राप्त करून घेण्यासाठीं आपणांला सर्वांचा दास केलें आहे. २० यहूदी लोक प्राप्त करून घेण्यासाठीं मी यहूदी लोकांना यहूद्यासारिखा झालों; नियमशास्त्राधीन लोक प्राप्त करून घेण्यासाठीं मी नियमशास्त्राधीन नसतां, नियमशास्त्राधीनांस, अधीनासारिखा झालों. २१ ज्यांस नियमशास्त्र नाहीं त्यांस प्राप्त करून घेण्यासाठीं, म्हणजे नियमशास्त्र नाहीं अशांस, मी नियमशास्त्र नाहीं असा झालों, तरी देवाच्या नियमाबाहेर होतों असें नाहीं, ख्रिस्ताच्या नियमाधीन होतों. २२ दुर्बळांस प्राप्त करून घेण्यासाठीं मी

दुर्बळांस दुर्बळ झालों. मी सर्वांसाठीं सर्व कांहीं झालों
आहें, यासाठीं कीं मी कसें तरी कित्येकांचें तारण साधावें.
२३ मी सर्व कांहीं सुवार्तेकरितां करितों, यासाठीं कीं मी
इतरांबरोबर तिचा अंशभागी व्हावें.

## विजयप्राप्तीस आवश्यक असा करावयाचा प्रयत्न

२४ शर्यतींत धावणारे सर्व धावतात, पण एकालाच
पैज मिळते हें तुम्हांस ठाऊक नाहीं काय? तुम्हांस ती
मिळेल असें धावा. २५ प्रत्येक मल्लयुद्ध करणारा सर्व
गोष्टींविषयीं इंद्रियदमन करितो; ते नाशवंत मुगूट मिळ-
विण्यासाठीं असें करितात, आपण तर अविनाशी मुगूट
मिळविण्यासाठीं करितों. २६ मीहि तसाच धावतों, म्हणजे
अनिश्चितपणें धावत नाहीं. तशी कुस्तीहि करितों, म्हणजे
वाऱ्यावर मुष्टिप्रहार करीत नाहीं; २७ तर मी आपल्या
शरीराला तुकवून त्यांस दास करून ठेवितों; असें न
केल्यास मी दुसऱ्यांस घोषणा केल्यावर कदाचित् मीच
अपात्र ठरेन.

## इस्राएल लोकांच्या इतिहासावरून इशारा

१० १ बंधुजनहो, आपले पूर्वज सर्वच मेघाखालीं
होते, आणि समुद्रांतून ते सर्व पार गेले; याविषयीं
तुम्हीं अजाण असावें अशी माझी इच्छा नाहीं. २
मेघ व समुद्र यांच्याद्वारें मोशामध्यें त्या सर्वांचा बाप्तिस्मा
झाला; ३ सर्वांनीं, एकच आध्यात्मिक अन्न खाल्लें; ४
आणि सर्व एकच आध्यात्मिक पाणी प्याले, कारण ते
आपल्यामागें चालणाऱ्या आध्यात्मिक खडकांतून पीत
होते; तो खडक तर ख्रिस्त होता. ५ तरी त्यांतील बहुतेक
लोकांविषयीं देव संतुष्ट नव्हता; यामुळें 'त्यांचा
रानांत नाश झाला.' ६ ह्या गोष्टी आपल्याला
दाखले अशा झाल्या, यासाठीं कीं त्यांनीं
'लोभ धरिला' तसें आपण वाईट गोष्टींचे 'लोभी होऊं
नये.' ७ त्यांच्यापैकीं कित्येक मूर्तिपूजक होते तसे होऊं
नका; 'लोक खावयालाप्यावयाला बसले, नंतर खेळावयाला
उठले,' असें शास्त्रांत लिहिलें आहे. ८ त्यांपैकीं कित्येकांनीं
जारकर्म केलें, त्याप्रमाणें आपण जारकर्म करूं नये; ते एका
दिवसांत तेवीस हजार मरून पडले. ९ त्यांपैकीं कित्येकांनीं
प्रभूची परीक्षा केली, आणि ते सापांच्या योगें नाश पावले,
त्याप्रमाणें आपण प्रभूची परीक्षा करूं नये. १० त्यांपैकीं
कित्येकांनीं कुरकूर केली, आणि ते संहारकर्त्याकडून नाश
पावले, त्याप्रमाणें तुम्ही कुरकूर करूं नका. ११ या गोष्टी
दाखल्याच्या रूपानें त्यांस घडल्या; आणि ज्या आपल्यावर
युगांचा शेवट आला आहे त्या आपल्या बोधासाठीं त्या
लिहिल्या आहेत. १२ यास्तव आपण उभे आहों असें ज्यास
वाटतें त्यानें पडूं नये म्हणून संभाळावें. १३ मनुष्यास
सहन होते तिच्याशिवाय दुसरी परीक्षा तुम्हांवर गुदरली
नाहीं; आणि देव विश्वासपात्र आहे, तो तुमची परीक्षा
तुमच्या शक्तीपलीकडे होऊं देणार नाहीं, तर परीक्षेबरोबर
तिच्यांतून निभावण्याचा उपाय करील, असें कीं तुम्हीं ती
सहन करावयास समर्थ व्हावें.

## मूर्तिपूजेचा त्याग केला पाहिजे

१४ यास्तव माझ्या प्रिय बंधूंनो, तुम्ही मूर्तिपूजेपासून
दूर पळा. १५ तुम्हांस सुज्ञ समजून मी तुम्हांबरोबर बोलतों;
मी काय म्हणतों त्याचा तुम्हीच निर्णय करा. १६ जो
आशीर्वादाचा प्याला आपण आशीर्वादित करितों तो
ख्रिस्ताच्या रक्ताची सहभागिता आहे कीं नाहीं? जी भाकर
आपण मोडितों ती ख्रिस्ताच्या शरीराची सहभागिता आहे
कीं नाहीं? १७ आपण बहुत असून एक भाकर, एक
शरीर असे आहों; आपण सर्व त्या एका भाकरीचे विभागी
आहों. १८ जे जातीनें इस्राएल त्यांकडे पाहा; यज्ञ भक्षण
करणारे वेदीचे भागीदार नाहींत काय? १९ तर माझें
म्हणणें काय आहे? मूर्तीचा नैवेद्य कांहीं तरी आहे, अथवा
मूर्ति कांहीं तरी आहे काय? नाहीं; २० तरी विदेशी लोक
जो यज्ञ करितात 'तो देवाला नव्हे तर भूतांला करितात;'
आणि तुम्हीं भूतांचे सहभागी व्हावें अशी माझी इच्छा नाहीं.
२१ तुमच्यानें प्रभूचा प्याला व भूतांचा प्याला पिववत
नाहीं; 'प्रभूच्या मेजावरचें' व भूतांच्या मेजावरचें तुमच्यानें
खाववत नाहीं. २२ आपण 'प्रभूला ईर्ष्येस पेटवितों काय?'
आपण त्यापेक्षां बलवान् आहों काय?

२३ सर्व गोष्टी करण्याची मुभा आहे तरी सर्व गोष्टी
हितकारक असतात असें नाहीं. सर्व गोष्टी करण्याची मुभा
आहे तरी सर्व गोष्टी वृद्धि करितात असें नाहीं. २४ कोणी

आपलेंच हित पाहूं नये तर दुसऱ्याचेंहि पाहावें. २५
खाटिकबाजारांत जें विकण्यांत येतें तें निःशंक मनोवृत्तीनें
चौकशी न करितां खा, २६ कारण 'पृथ्वी व तिजवर जें
कांहीं भरलें आहे तें प्रभूचें आहे.' २७ विश्वास न
ठेवणाऱ्यांपैकीं कोणीं तुम्हांला जेवावयाला बोलाविलें, आणि
तुमची जाण्याची इच्छा असली तर जें कांहीं तुमच्यापुढें
वाढितील तें निःशंक मनोवृत्तीनें चौकशी न करितां खा;
२८ परंतु कोणी तुम्हांला सांगेल कीं हा नैवेद्य आहे, तर
ज्यानें हें कळविलें त्याकरितां व मनाला शंका न यावी
याकरितां खाऊं नका; २९ शंका ही तुमच्या मनांत नव्हे तर
त्याच्या; कारण माझ्या स्वतंत्रतेचा न्यायनिवाडा दुसऱ्याच्या
विवेकभावनेनें कां व्हावा? ३० मी आभारपूर्वक खातों तर
ज्याविषयीं मी आभार व्यक्त करितों त्याविषयीं माझी निंदा
कां व्हावी? ३१ यास्तव तुम्ही खातां, पितां किंवा जें
कांहीं करितां तें सर्व देवाच्या गौरवासाठीं करा. ३२ यहू-
द्यांस, हेल्लेण्यांस व देवाच्या मंडळीसहि अडखळविणारे
होऊं नका; ३३ तर जसें मी सर्व गोष्टींत सर्वांस संतोष-
वितों आणि त्यांचें तारण व्हावें एतदर्थ स्वहित न पाहतां
बहुतांचें हित पाहतों, तसें तुम्ही करा.

११ १ जसा मी ख्रिस्ताचा अनुकारी आहें, तसें
तुम्ही माझे अनुकारी व्हा.

## सभेंत प्रशस्त वर्तन

२ तुम्ही सर्व गोष्टींत माझी आठवण करितां, आणि मीं
तुम्हांस सांगून ठेविलेले विधि जशाचे तसे दृढ धरून
पाळितां, म्हणून मी तुमची वाहवा करितों. ३ प्रत्येक
पुरुषाचें मस्तक ख्रिस्त आहे; स्त्रीचें मस्तक पुरुष आहे,
आणि ख्रिस्ताचें मस्तक देव आहे, हें तुम्हांला समजावें
अशी माझी इच्छा आहे. ४ जो पुरुष आपलें मस्तक
आच्छादून प्रार्थना करितो किंवा संदेश देतो तो आपल्या
मस्तकाचा अपमान करितो; ५ तसेंच जी स्त्री उघड्या
मस्तकानें प्रार्थना करिते किंवा संदेश देते ती आपल्या
मस्तकाचा अपमान करिते; कारण ती मुंडलेल्या स्त्रीसारखीच
होते. ६ स्त्री जर आपलें मस्तक आच्छादीत नाहीं तर
तिनें आपले केस कातरावे, परंतु जर केस कातरणें किंवा
मुंडणें स्त्रीला लाजविणारी गोष्ट आहे तर तिनें आपलें
मस्तक आच्छादावें. ७ पुरुष देवाची प्रतिमा व वैभव
असल्यामुळें त्याला मस्तक आच्छादन करणें योग्य नाहीं;
स्त्री तर पुरुषाचें गौरव आहे. ८ पुरुष स्त्रीपासून झाला
नाहीं; तर स्त्री पुरुषापासून झाली; ९ आणि पुरुष स्त्रीसाठीं
उत्पन्न केला नाहीं; तर स्त्री पुरुषासाठीं केली; १० यामुळें
देवदूतांकरितां स्त्रीनें आपल्यावर असलेल्या अधिकाराचें
चिन्ह मस्तकावर ठेवावें हें योग्य आहे. ११ तरी प्रभूमध्यें
पुरुष स्त्रीपासून वेगळा नाहीं आणि स्त्री पुरुषापासून वेगळी
नाहीं. १२ कारण जशी स्त्री पुरुषापासून, तसा पुरुष
स्त्रीपासून आहे; आणि सर्व कांहीं देवापासून आहे. १३
तुम्ही आपसांत विचार करून पाहा; मस्तकावर आच्छादन
घेतल्यावांचून देवाची प्रार्थना करणें स्त्रीला शोभतें काय?
१४ लांब केस राखणें हें पुरुषाला अप्रतिष्ठेचें आहे असें
निसर्ग देखील तुम्हांला सांगत नाहीं काय? १५ स्त्रीनें लांब
केस राखणें तिला भूषणावह आहे; कारण केस तिला
आच्छादनाकरितां दिले आहेत. १६ तरी जर कोणी वितंड-
वादी दिसला तर आपल्यांत अशी रीत नाहीं आणि
देवाच्या मंडळ्यांतहि नाहीं.

## प्रभुभोजनाचें स्पष्टीकरण

१७ अशी आज्ञा दिली तरी तुमच्या एकत्र होण्यानें
तुमचें बरें न होतां वाईट होतें, म्हणून मी तुमची वाहवा
करीत नाहीं. १८ प्रथम हें कीं, तुमची मंडळी जमते
तेव्हां तुम्हांत फुटी असतात, असें मी ऐकतों; व तें कांहीं
अंशीं खरें मानितों, १९ कारण तुम्हांमध्यें जे पटलेले
आहेत ते प्रकट व्हावे म्हणून तुम्हांमध्यें पक्षभेद असलेच
पाहिजेत. २० यामुळें जेव्हां तुम्ही एकत्र मिळतां तेव्हां
प्रभुभोजन करणें शक्य नसतें; २१ कारण भोजन करते-
वेळीं प्रत्येक जण आपलें घरचें जेवण दुसऱ्यापूर्वी जेवतो;
एक भुकेला राहतो तर एक मस्त होतो. २२ तुम्हांस
खावयाप्यावयाला घरें नाहींत काय? किंवा तुम्ही देवाच्या
मंडळीस धिक्कारून ज्यांच्याजवळ कांहीं नाहीं त्यांना
लाजवितां काय? मी तुम्हांस काय सांगूं? याविषयीं मीं
तुमची वाहवा करावी काय? मी तुमची वाहवा करीत
नाहीं. २३ कारण जें मला प्रभूपासून मिळालें, तेंच मीं
तुम्हांला सांगून दिलें कीं, ज्या रात्रीं प्रभु येशू धरून दिला

गेला त्या रात्रीं त्यानें भाकर घेतली; २४ ईशोपकारस्मरण
करून ती मोडिली, आणि म्हटलें, तुम्हांसाठीं जें माझें
शरीर तें हें आहे, माझ्या स्मरणार्थ हें करा. २५ मग
भोजन झाल्यावर प्याला घेऊन त्यानें तसेंच केलें, आणि
म्हटलें, हा प्याला माझ्या रक्तांत नवा करार आहे; जित-
केदा तुम्ही हा पितां तितकेदा माझ्या स्मरणार्थ हें करा.
२६ कारण जितकेदा तुम्ही ही भाकर खातां, व हा प्याला
पितां तितकेदा तुम्ही प्रभूच्या मरणाची तो येईपर्यंत घोषणा
करितां. २७ जो कोणी अयोग्य प्रकारें ती भाकर खाईल
अथवा प्रभूचा प्याला पिईल, तो प्रभूचें शरीर व रक्त
यासंबंधानें दोषी होईल. २८ यास्तव मनुष्यानें आपली
परीक्षा करावी, आणि मग त्या भाकरींतून खावें व त्या
प्याल्यांतलें प्यावें. २९ त्या शरीराला न अनुलक्षून जो
खातो व पितो तो खाण्यानें व पिण्यानें आपणावर दंड
आणितो. ३० यामुळें तुम्हांमध्यें पुष्कळ जण दुर्बळ व
आजारी आहेत, आणि बरेच निजले आहेत. ३१ जर
आपण आपला न्यायनिवाडा केला असता तर आपल्यावर
दंड आला नसता. ३२ ज्या अर्थी आपल्यावर दंड आला
आहे त्या अर्थी आपल्याला प्रभूकडून शिक्षा होत आहे,
यासाठीं कीं जगाच्याबरोबर आपल्यास दंडाज्ञा होऊं नये.
३३ यास्तव बंधुजनहो, तुम्ही खावयाला एकत्र मिळतां
तेव्हां एकमेकांची वाट पाहा. ३४ कोणी भुकेला असला
तर त्यानें घरीं खावें, यासाठीं कीं, तुमचें एकत्र मिळणें
दंडासाठीं होऊं नये. बाकीच्या गोष्टींची व्यवस्था मी
आल्यावर पाहीन.

### आध्यात्मिक दानांची विविधता व एकता

१२ १ बंधुजनहो, तुम्हीं आत्मिक दानांविषयीं
अजाण असावें अशी माझी इच्छा नाहीं. २ तुम्ही
विदेशी होतां तेव्हां जसजसें वळण तुम्हांला
मिळालें तसतसें तुम्ही त्या मुक्या मूर्तींकडे बहकत गेलां हें
तुम्हांस ठाऊक आहे. ३ यास्तव मी तुम्हांस कळवितों कीं
देवाच्या आत्म्याच्या योगें बोलणारा कोणीहि इसम येशू
शापित आहे असें म्हणत नाहीं; आणि पवित्र आत्म्याच्या
योगें बोलल्यावांचून कोणालाहि येशू हा प्रभु आहे असें
म्हणतां येत नाहीं.

४ कृपादानांचे निरनिराळे प्रकार आहेत, तरी आत्मा
एकच आहे; ५ सेवा करण्याचे निरनिराळे प्रकार आहेत,
तरी प्रभु एकच; ६ आणि कार्यांचे निरनिराळे प्रकार
आहेत, तरी सर्वांत सर्व कार्यें करणारा देव एकच आहे;
७ तरी आत्म्याचें प्रकटीकरण एकेकाला उपयोग होण्या-
साठीं मिळतें. ८ एकाला आत्म्याच्या द्वारें ज्ञानाची उक्ति
मिळते; एकाला त्याच आत्म्यानुसार विद्येची उक्ति;
९ एकाला त्याच आत्म्यांत विश्वास; एकाला त्याच एका
आत्म्यांत निरोगी करण्याचीं कृपादानें; १० एकाला अद्भुत-
कार्यें करावयाची शक्ति; एकाला संदेशशक्ति; एकाला
आत्मे ओळखण्याची शक्ति; एकाला विशेष प्रकारच्या भाषा
बोलण्याची शक्ति; व एकाला भाषांचा अर्थ सांगण्याची
शक्ति मिळते; ११ तरी हीं सर्व कार्यें तोच एक आत्मा
करितो, तो आपल्या इच्छेप्रमाणें एकेकाला तीं वांटून देतो.

### शरीरावरून घेतलेलें उदाहरण

१२ जसें शरीर एक असून त्याला अवयव पुष्कळ
असतात आणि त्या शरीराचे अवयव पुष्कळ असून सर्व
मिळून एक शरीर बनतें, तसा ख्रिस्तहि आहे. १३ कारण
आपण यहूदी असूं किंवा हेल्लेणी असूं, दास असूं किंवा
स्वतंत्र असूं, आपणां सर्वांना एका आत्म्यांत एक शरीर
होण्यासाठीं बाप्तिस्मा मिळाला आहे, आणि आपण सर्व
एकाच [1]आत्म्यानें संचरित झालों आहों. १४ कारण शरीर
म्हणजे एक अवयव असें नव्हे, तर बहुत अवयव असें
आहे. १५ जर पाय म्हणेल, मी हात नाहीं म्हणून मी
शरीराचा नाहीं, तर त्यावरून तो शरीराचा नाहीं असें
होत नाहीं. १६ जर कान म्हणेल, मी डोळा नाहीं म्हणून
मी शरीराचा नाहीं, तर त्यावरून तो शरीराचा नाहीं
असें होत नाहीं. १७ सगळें शरीर डोळा असतें तर
ऐकणें कोठें असतें? सगळें ऐकणें असतें तर हुंगणें कोठें
असतें? १८ तर देवानें आपल्या इच्छेप्रमाणें शरीराला
वेगवेगळे सर्व अवयव लाविले आहेत. १९ ते सर्व
अवयव मिळून एक असते तर शरीर कोठें असतें?
२० तर मग अवयव पुष्कळ असून शरीर एक असें आहे.
२१ डोळ्याला हातास म्हणतां येत नाहीं कीं मला तुझी

१ मुळांत : एकच आत्मा पाजला आहे.

गरज नाहीं; तसेंच मस्तकाला पायांस म्हणतां येत नाहीं
कीं मला तुमची गरज नाहीं. २२ इतकेंच नव्हें तर
शरीराचे जे अवयव विशेष अशक्त दिसतात ते आवश्यक
आहेत; २३ शरीराचीं जीं अंगें कमी योग्यतेचीं अशीं
आपण मानितों त्यांस आपण पांघरूण घालून विशेष मान
देतों, आणि आपल्या कुरूप अंगांस सुरूपता मिळते; २४
आपल्या सुरूप अंगांस अशी गरज नाहीं; जें उणें त्यांस
विशेष मान मिळावा अशा रीतीनें देवानें शरीर जुळविलें
आहे; २५ यासाठीं कीं शरीरांत फूट नसावी, तर अव-
यवांनीं एकमेकांची सारखी काळजी घ्यावी. २६ एक
अवयव दुःखित झाला तर त्याबरोबर सर्व अवयव दुःखित
होतात; एका अवयवाची वाहवा झाली तर त्याबरोबर सर्व
अवयव आनंदित होतात. २७ तुम्ही ख्रिस्ताचें शरीर
असून प्रत्येक जण आपापल्या कार्याप्रमाणें त्याचे अवयव
आहां. २८ तसें देवानें मंडळींत कित्येकांना नेमिलें आहे;
प्रथम प्रेषित, दुसरे संदेष्टे, तिसरे शिक्षक; शिवाय अद्भुत
कार्यें करणारे, निरोगी करण्याचीं कृपादानें मिळालेले,
समाचार घेणारे, व्यवस्था करणारे, भिन्नभिन्न भाषा
बोलणारे असे नेमिले आहेत. २९ सर्वच प्रेषित आहेत
काय? सर्वच संदेष्टे आहेत काय? सर्वच शिक्षक आहेत काय?
सर्वच अद्भुत कार्यें करणारे आहेत काय? ३० सर्वांसच
निरोगी करण्याचीं कृपादानें आहेत काय? सर्वच भिन्नभिन्न
भाषा बोलतात काय? भाषांचा अर्थ सर्वच सांगतात काय?
३१ श्रेष्ठ कृपादानांची सबळ इच्छा बाळगा; शिवाय एक
सर्वोत्कृष्ट मार्ग मी तुम्हांस दाखवितों.

### प्रेम हें सर्वश्रेष्ठ दान होय

**१३** १ मी मनुष्यांच्या व देवदूतांच्या जिव्हांनीं
बोललों आणि माझ्या ठायीं प्रीति नसली, तर मी
वाजणारी थाळी किंवा झणझणणारी झांज असा
आहें. २ मला संदेश देण्याची शक्ति असली, मला
सर्व गुजें व सर्व विद्या अवगत असल्या, आणि डोंगर
ढळवितां येतील असा दृढ विश्वास मला असला, पण
माझ्या ठायीं प्रीति नसली, तर मी कांहींच नाहीं. ३ मीं
आपलें सर्व धन अन्नदानार्थ दिलें, आपलें शरीर जाळण्या-
साठीं दिलें, आणि माझ्या ठायीं प्रीति नसली तर मला
कांहीं लाभ नाहीं. ४ प्रीति सहनशील आहे, उपकारशील
आहे; प्रीति हेवा करीत नाहीं; प्रीति बढाई करीत नाहीं,
फुगत नाहीं; ५ गैरशिस्त वागत नाहीं, स्वार्थ पाहत नाहीं,
चिडत नाहीं, अपकार स्मरत नाहीं; ६ अनीतींत आनंद
मानीत नाहीं, तर सत्य समागमांत आनंद मानिते; ७ सर्व
कांहीं सहन करिते, सर्व कांहीं खरें मानण्यास सिद्ध असते,
सर्वांची आशा धरिते, सर्वसंबंधानें धीर धरिते. ८ प्रीति
कधीं खचत नाहीं; संदेश असले तरी ते रद्द होतील, भाषा
असल्या तरी त्या समाप्त होतील; आणि विद्या असली
तरी ती रद्द होईल. ९ आपल्याला केवळ अंशतः कळतें,
आणि अंशतः संदेश देतां येतो; १० पण पूर्णत्वाचें
आगमन झाल्यावर अपूर्णता नष्ट होईल. ११ मी मूल
होतों तेव्हां मुलासारखा बोलत असें, मुलासारखी माझी
बुद्धि असे, मुलासारखे माझे विचार असत; आतां प्रौढ
झाल्यावर मीं मुलाच्या गोष्टी सोडून दिल्या आहेत. १२
हल्लीं आपल्याला आरशांत अस्पष्ट असें दिसतें; परंतु नंतर
साक्षात् पाहूं. आतां मला कळतें तें अपूर्ण आहे; पण नंतर,
मला पूर्णपणें ओळखण्यांत आलें आहे तसें, मी पूर्णपणें
ओळखीन. १३ सारांश, विश्वास, आशा, प्रीति हीं तिन्हीं
टिकणारीं आहेत; त्यांत प्रीति श्रेष्ठ आहे.

### ईशसंदेशकथनाचें व 'भाषा' बोलण्याचें दान

**१४** १ प्रीति हें तुमचें ध्येय असूं द्या, तरी
आध्यात्मिक दानांची, आणि विशेषतः तुम्हांस
संदेश सांगतां यावा अशी प्रबळ इच्छा बाळगा.
२ कारण भाषा बोलणारा मनुष्यांबरोबर नव्हे, तर देवा-
बरोबर बोलतो, तें मनुष्याला समजत नाहीं; तो आत्म्यानें
गूढ गोष्टी बोलतो. ३ संदेष्टा हा मनुष्यांस उन्नति, बोध व
सांत्वन होण्यासारखें बोलतो. ४ भाषा बोलणारा स्वतःचीच
उन्नति करितो; संदेष्टा मंडळीची उन्नति करितो. ५ तुम्हीं
सर्वांनीं भाषा बोलाव्या हें मला बरें वाटतें, तरी विशेषतः
तुम्हीं संदेश द्यावा अशी माझी इच्छा आहे; कारण
मंडळीच्या वृद्धीप्रीत्यर्थ अर्थ न सांगतां जो भाषा बोलतो
त्याच्यापेक्षां संदेष्टा श्रेष्ठ आहे. ६ बंधुजनहो, असें
असल्यामुळें मी तुम्हांकडे येऊन भिन्नभिन्न भाषांनीं बोलेन,

आणि प्रकटीकरणानें, विद्येनें, संदेशानें किंवा शिक्षणानें
तुम्हांबरोबर बोलणार नाहीं, तर मी तुमचें काय हित
करीन ? ७ पांवा, वीणा, असल्या नाद काढणाऱ्या निर्जीव
वस्तूंच्या भिन्नभिन्न नादांत भेद करून न दाखविल्यास,
पांव्याचा नाद कोणता, वीणेचा नाद कोणता, हें कसें
समजेल ? ८ तसेंच करणाहि अस्पष्ट ध्वनि काढील, तर
लढाईस जाण्याची तयारी कोण करील ? ९ त्याप्रमाणें
तुम्हीहि अमुक एका वाणीनें स्पष्ट भाषण न केलें तर जें
बोललां तें कसें कळेल ? तुम्ही वाऱ्याबरोबर बोलणारे असे
व्हाल. १० जगांत भाषांचे बहुत प्रकार असतील, तरी
एकहि अर्थरहित नाहीं. ११ वास्तव मला भाषेचा अर्थ
समजत नाहीं, तर बोलणाऱ्याला मी बर्बर असा होईन,
आणि बोलणारा मला बर्बर असा होईल. १२ तर
जे तुम्ही आध्यात्मिक दानांविषयीं उत्सुक आहां ते
तुम्ही, मंडळीच्या उन्नतीसाठीं तीं दानें विपुल मिळावीं
म्हणून खटपट करा. १३ भाषा बोलणारानें आपणाला अर्थ
सांगतां यावा म्हणून प्रार्थना करावी. १४ कारण जर मी
अन्य भाषेंत प्रार्थना करितों, तर माझा आत्मा प्रार्थना
करितो, पण माझ्या बुद्धीचा कोणास उपयोग होत नाहीं.
१५ तर मग काय ? मी प्रार्थना आत्म्याच्या सामर्थ्यानें
करणार व बुद्धीच्या सामर्थ्यानेंहि करणार; मी स्तोत्रगान
आत्म्याच्या सामर्थ्यानें गाणार व बुद्धीच्या सामर्थ्यानेंहि
गाणार. १६ तूं केवळ आत्म्यानें धन्यवाद केला तर
जो अशिक्षित लोकांपैकीं आहे तो तुझ्या उपकार-
स्मरणाला, आमेन, कसें म्हणेल ? कारण तूं जें बोलतोस
तें त्याला समजत नाहीं. १७ तुझें उपकारस्मरण चांगलें
असेल, तरी त्यानें दुसऱ्याची वृद्धि होत नाहीं. १८ तुम्हां
सर्वांपेक्षां मी अधिक भाषा बोलतों म्हणून मी देवाचे
आभार मानितों. १९ तथापि मंडळींत अन्य भाषेनें दहा
हजार शब्द बोलावे यापेक्षां मीं दुसऱ्यांस शिकविण्यासाठीं
पांच शब्द स्वतः समजूनउमजून बोलावे हें मला आवडतें.

२० बंधुजनहो, बालबुद्धीचे होऊं नका; दुष्टपणाबाबत
तान्ह्या मुलांसारखे आणि समजुतदारपणाबाबत प्रौढ असे
व्हा. २१ नियमशास्त्रांत लिहिलें आहे कीं परभाषा बोल-
णाऱ्या लोकांच्या द्वारें व परकी मनुष्यांच्या ओठांनीं मी या
लोकांबरोबर बोलेन; तथापि तेवढ्यानें ते माझें ऐकणार
नाहींत, असें प्रभु म्हणतो. २२ यास्तव विश्वास ठेवणाऱ्यां-
साठीं नव्हें तर विश्वास न ठेवणाऱ्यांसाठीं भिन्नभिन्न
भाषा ह्या चिन्हादाखल आहेत; संदेश हा विश्वास
न ठेवणाऱ्यांसाठीं नव्हे तर विश्वास ठेवणाऱ्यांसाठीं आहे.
२३ सगळी मंडळी एकत्र जमली असतां सर्वच लोक
निरनिराळ्या भाषा बोलूं लागले, आणि अशिक्षित किंवा
विश्वास न ठेवणारे लोक आंत आले, तर तुम्ही वेडे आहां
असें ते म्हणणार नाहींत काय ? २४ परंतु सर्वच जण
संदेश देऊं लागले असतां कोणी विश्वास न ठेवणारा किंवा
अशिक्षित मनुष्य आंत आल्यास सर्वांकडून त्याच्या पापा-
विषयीं त्याची खातरी होते, सर्वांकडून त्याचा निर्णय होतो;
२५ त्याच्या अंतःकरणांतील गुप्त गोष्टी प्रकट होतात;
म्हणून तो उपडा पडून देवाचें वंदन करील, व देवाचें
वास्तव्य तुम्हांमध्यें खचीत आहे असें बोलून दाखवील.

### उपासनेंत सुव्यवस्था असण्याची आवश्यकता

२६ बंधुजनहो, तर मग काय ? तुम्ही एकत्र जमतां
तेव्हां तुम्हांमधील कोणाजवळ स्तोत्र, कोणाजवळ
शिक्षण, कोणाजवळ प्रकटीकरण, कोणाजवळ भाषा,
कोणाजवळ तिची व्याख्या, असें असावें; सर्व कांहीं
उन्नतीसाठीं असावें. २७ भाषा बोलणें आहे तर त्या
बोलणारे दोघे किंवा फारतर तिघे यांपेक्षां अधिक
नसावे व त्यांनीं त्या अनुक्रमें बोलाव्या आणि एकानें
अर्थ सांगावा; २८ परंतु अर्थ सांगणारा नसला तर त्यानें
मंडळींत गप्प राहावें; स्वतःबरोबर व देवाबरोबर बोलावें.
२९ संदेश देणाऱ्या दोघांनीं किंवा तिघांनीं बोलावें, आणि
इतरांनीं निर्णय करावा; ३० तरी बसलेल्या इतरांपैकीं
कोणाला कांहीं प्रकट झालें, तर बोलणाऱ्यानें उगेंच राहावें.
३१ सर्वांस शिक्षण मिळेल व सर्वांस बोध होईल, असें
तुम्हां सर्वांस एकामागून एक संदेश देतां येईल; ३२
संदेष्ट्यांचे आत्मे संदेष्ट्यांच्या स्वाधीन असतात; ३३
कारण देव अव्यवस्थेचा नाहीं, तर शांतीचा आहे; तसेंच
तो पवित्र जनांच्या सर्व मंडळ्यांत आहे.

३४ स्त्रियांनीं मंडळ्यांत उगेंच राहावें; त्यांस बोल-
ण्याची परवानगी नाहीं; नियमशास्त्रहि सांगतें त्याप्रमाणें

त्यांनीं अधीन असावें. ३५ त्यांस कांहीं माहिती करून
घेण्याची इच्छा असली तर त्यांनीं आपल्या नवऱ्यांस घरीं
विचारावें; स्त्रीनें मंडळींत बोलावें हें लाजेचें आहे. ३६
देवाचें वचन तुम्हांपासून चालू झालें काय? अथवा तें
केवळ तुम्हांकडे आलें काय?

३७ जर कोणी स्वतःला संदेष्टा किंवा आध्यात्मिक दान
प्राप्त झालेला असें मानितो, तर जें मीं तुम्हांस लिहिलें तें
प्रभूची आज्ञा आहे असें त्यानें समजावें; ३८ तसें कोणी
समजत नसल्यास न समजो.

३९ यास्तव बंधुजनहो, तुम्ही संदेश देण्याची प्रबळ
इच्छा बाळगा, व भिन्नभिन्न भाषा बोलणें मना करूं नका.
४० सर्व कांहीं साजेल असें व व्यवस्थितपणें होऊं द्या.

## मृतांचें पुनरुत्थान

१ बंधुजनहो, जी सुवार्ता मीं तुम्हांस सांगि-
१५ तली, जिचा तुम्हीं स्वीकार केला, जिच्यांत तुम्ही
स्थिरहि राहत आहां, २ जिच्या द्वारें तुम्हांला
तारण मिळालें आहे तीच सुवार्ता मी तुम्हांस कळवितों.
ज्या वचनानें तुम्हांस ही सुवार्ता सांगितली त्या वचनानुसार
ती तुम्हीं दृढ धरिली असेल; नसल्यास तुमचा विश्वास
व्यर्थ आहे. ३ मला जें सांगण्यांत आलें तें मीं तुम्हांस
सांगून दिलें, त्यापैकीं मुख्य हें कीं धर्मशास्त्राप्रमाणें ख्रिस्त
तुमच्याआमच्या पापांबद्दल मरण पावला; ४ तो पुरला
गेला; धर्मशास्त्राप्रमाणें तिसऱ्या दिवशीं उठविला गेला; ५
आणि तो केफाला, मग बारा जणांला दिसला; ६ त्यानंतर
तो एकदम पांचशांपेक्षां अधिक बंधूंना दिसला; त्यांतील
बहुतेक आजपर्यंत हयात आहेत, आणि कित्येकांनीं महा-
निद्रा घेतली आहे; ७ त्यानंतर तो याकोबाला, मग
सर्व प्रेषितांस दिसला; ८ आणि जणू काय अकाळीं
जन्मलेला जो मी त्या मलाहि सर्वांच्या शेवटीं दिसला.
९ कारण प्रेषितांत मी कनिष्ठ आहें; मी प्रेषित
म्हणवयास योग्य नाहीं, कारण मीं देवाच्या मंडळीचा
छळ केला. १० तरी जो कांहीं मी आहें तो देवाच्या
कृपेनें आहें; आणि मजवर त्याची जी कृपा ती व्यर्थ झाली
नाहीं; कारण त्या सर्वांपेक्षां मीं अतिशय श्रम केले. ते मीं
केले असें नाहीं, तर मजबरोबर असणाऱ्या देवाच्या कृपेनें
केले. ११ सारांश, मी असो किंवा ते असोत, अशीच
आम्ही घोषणा करितों, आणि तुम्हीं असाच विश्वास धरिला.

१२ आतां ख्रिस्त मेलेल्यांतून उठविला गेला आहे अशी
त्याविषयीं घोषणा होत आहे, तर मेलेल्यांचें पुनरुत्थान
नाहीं, असें तुम्हांतील कित्येक जण कसें म्हणतात? १३
मेलेल्यांचें पुनरुत्थान नाहीं, तर ख्रिस्तहि उठविला गेला
नाहीं; १४ आणि ख्रिस्त उठविला गेला नाहीं, तर आमची
घोषणा व्यर्थ व तुमचा विश्वासहि व्यर्थ; १५ आणि आम्ही
देवाविषयीं खोटे साक्षी असे ठरलों; कारण देवाविषयीं आम्ही
अशी साक्ष दिली कीं त्यानें ख्रिस्ताला उठविलें; पण मेलेले
उठविले जात नाहींत तर त्यानें त्याला उठविलें नाहीं. १६
मेलेले उठविले जात नाहींत तर ख्रिस्ताहि उठविला गेला
नाहीं. १७ ख्रिस्त उठविला गेला नाहीं तर तुमचा विश्वास
निष्फळ; तुम्ही अजून आपल्या पापांत आहां; १८ आणि
ख्रिस्तामध्यें ज्यांनीं महानिद्रा घेतली आहे त्यांचा नाश
झाला. १९ या आयुष्यांत आपण ख्रिस्तावर आशा ठेवणारे
असे केवळ आहों तर मग सर्व मनुष्यांपेक्षां आपण लाचार
आहों.

२० तरी पण ख्रिस्त महानिद्रा घेतलेल्यांतलें प्रथम
फळ असा मेलेल्यांतून उठविला गेला आहेच. २१ मनु-
ष्याच्या द्वारें मरण आलें, म्हणून मनुष्याच्या द्वारे मेलेल्यांचें
पुनरुत्थानहि आहे. २२ जसे आदामामध्यें सर्व मरतात
तसे ख्रिस्तामध्यें सर्व जीवंत केले जातील; २३ पण प्रत्येक
आपापल्या क्रमाप्रमाणें; प्रथम फळ ख्रिस्त; मग ख्रिस्ताच्या
आगमनकाळीं जे त्याचे होणार ते लोक. २४ नंतर शेवट
होईल, तेव्हां सर्व आधिपत्य, सर्व अधिकार, व सामर्थ्य हीं
नाहींतशीं केल्यावर देवपित्याला तो राज्य सोपून देईल.
२५ कारण आपल्या 'पायांखालीं सर्व शत्रु ठेवीपर्यंत' त्याला
राज्य केलें पाहिजे. २६ शेवटला शत्रु जो मृत्यु तो नाहींसा
केला जाईल. २७ 'त्यानें सर्व वश करून याच्या पायांखालीं
ठेविलें;' परंतु 'सर्व वश केलें आहे' असें जेव्हां म्हटलें तेव्हां,
ज्यानें त्याला सर्व वश करून दिलें, तो अर्थातच बाहेर
राहिला. २८ त्याला सर्व कांहीं वश झालें असें जेव्हां होईल
तेव्हां, ज्यानें त्याला सर्व वश करून दिलें त्याला, पुत्रहि
स्वतः वश होईल; यासाठीं कीं देवानें सर्वांत सर्व असावें.

२९ असें नसल्यास मेलेल्यांबद्दल जे बाप्तिस्मा घेतात
ते काय करितील? जर मेलेले मुळींच उठविले जात नाहींत
तर त्यांच्याबद्दल ते बाप्तिस्मा कां घेतात? ३० आम्हीहि
घडोघडी प्राणसंकटांत कां पडतों? ३१ बंधुजनहो, तुम्हां-
विषयीं जो अभिमान मला ख्रिस्त येशू आपला प्रभु ह्याच्या
ठायीं आहे त्याची शपथ घेऊन मी म्हणतों कीं मी रोज
रोज मरतों; ३२ इफिसांत मीं श्वापदाबरोबर लढाई केली
ती मनुष्यांच्या साधारण हेतूनें केली असती तर मला काय
लाभ? मेलेले उठविले जात नाहींत, 'तर चला, आपण खाऊं,
पिऊं, कारण उद्यां मरावयाचें आहे.' ३३ फसूं नका, कुसं-
गतीनें नीति बिघडते. ३४ धार्मिकतेसंबंधानें शुद्धीवर या,
आणि पाप करूं नका; कारण कित्येकांस देवासंबंधानें ज्ञान
नाहीं; हें मी तुम्हांस लाजविण्यासाठीं बोलतों.

३५ आतां कोणी म्हणेल, मेलेले कसे उठविले जातात,
व ते कोणत्या प्रकारच्या शरीरानें येतात? ३६ हे
निर्बुद्धि मनुष्या, जें तूं स्वतः पेरितोस तें न मेलें तर
तें जीवंत होत नाहीं; ३७ आणि तूं पेरितोस त्याचें
भावी अंग तूं पेरीत नाहींस, तर नुसता दाणा, तो
गव्हाचा किंवा दुसऱ्या कशाचा असेल; ३८ देव आपल्या
संकल्पाप्रमाणें त्याला अंग देतो; म्हणजे बीजांतल्या
प्रत्येकाला ज्याचें त्याचें अंग देतो. ३९ सर्व देह सार-
खेच नाहींत; तर मनुष्यांचा देह हा एक प्रकार, पक्ष्यांचा
देह हा एक प्रकार व माशांचा देह हा एक प्रकार. ४०
तशींच स्वर्गीय शरीरें व पार्थिव शरीरें आहेत; पण स्वर्गी-
यांचें तेज एक, आणि पार्थिवांचें एक. ४१ सूर्याचें तेज
वेगळें; चंद्राचें तेज वेगळें; ताऱ्यांचें तेज वेगळें; ताऱ्यांता-
ऱ्यांच्या तेजांत भेद आहे; ४२ तसें मेलेल्यांचें पुनरुत्थान आहे.
विनाशीपणांत पेरलें जातें; अविनाशीपणांत उठविलें जातें;
४३ अपमानांत पेरलें जातें; गौरवांत उठविलें जातें; अशक्त-
पणांत पेरलें जातें; सामर्थ्यांत उठविलें जातें; ४४ प्राणमय
शरीर असें पेरलें जातें; आध्यात्मिक शरीर असें उठविलें
जातें. जर प्राणमय शरीर आहे तर आध्यात्मिक शरीरहि आहे.
४५ त्याप्रमाणें शास्त्रलेख आहे कीं 'पहिला मनुष्य आदाम
जीवंत प्राणी असा झाला,' शेवटला आदाम जीवंत करणारा
आत्मा असा झाला. ४६ तथापि जें आध्यात्मिक तें प्रथम
नाहीं; प्राणमय तें प्रथम आहे, मग जें आध्यात्मिक तें.
४७ 'पहिला मनुष्य भूमीपासून मातीचा आहे,' दुसरा
मनुष्य स्वर्गापासून आहे. ४८ तो जसा मातीचा होता तसे जे
मातीचे तेहि आहेत; आणि तो स्वर्गांतला जसा आहे तसेच
जे स्वर्गांतले तेहि आहेत; ४९ आणि जो मातीचा त्याचें
प्रतिरूप जसें आपण धारण केलें, तसें जो स्वर्गांतला
त्याचेंहि प्रतिरूप धारण करूं.

५० बंधुजनहो, मी असें म्हणतों कीं मांस व रक्त
ह्यांना देवाच्या राज्याचें वतन मिळूं शकत नाहीं;
आणि विनाशीपणाला अविनाशीपणाचें वतन मिळत नाहीं.
५१ पाहा, मी तुम्हांस एक गूढ गोष्ट सांगतों; आपण
सर्वच महानिद्रा घेणार नाहीं, तरी आपण सर्व बदलून
जाऊं, ५२ क्षणांत, निमिषांत, शेवटल्या करण्याच्या
वेळेस; कारण करणा वाजेल, मेलेले ते अविनाशी
असे उठविले जातील, आणि आपण बदलून जाऊं.
कारण हें जें विनाशी त्यानें अविनाशीपण परिधान करावें,
५३ आणि हें जें मर्त्य त्यानें अमरत्व परिधान करावें
हें आवश्यक आहे. ५४ हें जें विनाशी त्यानें अविनाशी-
पण परिधान केलें, आणि हें जें मर्त्य त्यानें अमरत्व
परिधान केलें, असें जेव्हां होईल, तेव्हां 'मरण विजयांत
ग्रासिलें गेलें आहे,' असा जो शास्त्रलेख तो पूर्ण होईल.
५५ 'अरे मरणा, तुझा विजय कोठें? अरे मरणा, तुझी
नांगी कोठें?' ५६ मरणाची नांगी पाप; आणि पापाचें
बळ नियमशास्त्र आहे; ५७ तरी जो देव आपल्या प्रभु
येशू ख्रिस्ताच्या द्वारें आपणांला जय देतो त्याची
स्तुति असो. ५८ यास्तव माझ्या प्रिय बंधूंनो, प्रभूमध्यें
तुमचे श्रम व्यर्थ नाहींत हें तुम्ही जाणून आहां; म्हणून
तुम्ही स्थिर, अढळ व प्रभूच्या कामांत सर्वदा अति तत्पर
असा.

## यरुशलेम येथील गोरगरिबांसाठीं जमविलेली वर्गणी

१६ १ आतां पवित्र जनांसाठीं जी वर्गणी तिज-
विषयीं मीं गलतीयांतील मंडळ्यांस आज्ञा दिल्या-
प्रमाणें तुम्हीहि करा. २ आठवड्याच्या पहिल्या
दिवशीं तुम्हीं प्रत्येकानें जसें आपणांस यश मिळालें असेल

त्याप्रमाणें आपणाजवळ द्रव्य जमा करून ठेवावें; यासाठीं
कीं मी येईन तेव्हां वर्गण्या होऊं नयेत. ३ मी येईन तेव्हां
ज्या कोणांस तुम्हीं पत्रें देऊन मान्य कराल त्यांस तुमचा
धर्मादाय यरुशालेमास पोहंचविण्याकरितां मी पाठवीन.
४ मींहि जावें असें योग्य दिसल्यास ते माझ्याबरोबर येतील.

## खासगी बाबी व निरोप घेणें

५ मी जातांना मासेदोनियांतून तुम्हांकडे येईन; कारण
मी मासेदोनियांतून नीट जाणार आहें; ६ पण कदाचित्
तुम्हांजवळ राहीन व हिंवाळाहि घालवीन, यासाठीं कीं
मला जावयाचें असेल तिकडे तुम्हीं मला वाटेस लावावें.
७ कारण आतां तुम्हांस केवळ भेटून जावें अशी माझी इच्छा
नाहीं; तर प्रभूची इच्छा असल्यास मी कांहीं दिवस तुम्हां-
जवळ राहीन अशी आशा आहे. ८ तरी पन्नासाव्या दिव-
साच्या सणापर्यंत मी इफिस एथें राहीन; ९ कारण मोठें व
कार्य साधण्याजोगें द्वार मजसाठीं उघडलें आहे, आणि
विरोध करणारे पुष्कळच आहेत.

१० तीमथ्य आल्यास त्यानें तुमच्याजवळ निर्भयपणानें
राहावें म्हणून खबरदारी घ्या; कारण जसा मी तसा तोहि
प्रभूचें काम करणारा आहे; ११ यास्तव कोणी त्याला
तुच्छ मानूं नये, तर त्यानें मजकडे यावें म्हणून त्याला
सुखरूपपणें वाटेस लावा; कारण मी त्याची बंधुजनांसह
येण्याची वाट पाहत आहें. १२ आपला बंधु अपुल्लोस
ह्यानें बंधुजनांबरोबर तुम्हांकडे यावें, म्हणून मीं त्याला
फार विनवणी केली; तथापि आतांच यावें अशी त्याची
इच्छा अगदीं नव्हती; सवड होईल तेव्हां तो येईल.

१३ सावध असा, विश्वासांत स्थिर राहा, मर्दासारखे
वागा; खंबीर व्हा. १४ तुमचें सर्व कांहीं कार्य प्रीतीनें
व्हावें.

१५ बंधुजनहो, तुम्हांला स्तेफनाच्या घराण्याची माहिती
आहे; तें अखयाचें प्रथम फळ आहे, आणि त्यांनीं आप-
णांस पवित्र जनांच्या सेवेला वाहून दिलें आहे. १६
अशांस, आणि जो कोणी सेवेंत साहाय्य करितो व श्रम
करितो त्यास, तुम्हीं मान्य असावें अशी मी तुम्हांस
विनंति करितों. १७ स्तेफना, फर्तूनात व अखायिक हे
आल्यानें मला आनंद झाला आहे; कारण तुम्ही नसल्याची
उणीव त्यांनीं भरून काढिली आहे. १८ त्यांनीं माझ्या व
तुमच्या आत्म्यांस विश्रांति दिली आहे; यास्तव तुम्ही
अशांस मान द्या.

१९ आसियांतल्या मंडळ्या तुम्हांस सलाम सांगतात.
अक्विला व प्रिस्का हीं व त्यांच्या घरांत जी मंडळी जमत
असते तीहि तुम्हांस प्रभूमध्यें फार फार सलाम सांगतात.
२० सर्व बंधु तुम्हांस सलाम सांगतात. पवित्र चुंबनानें
एकमेकांस सलाम करा.

२१ मज पौलाचा स्वदस्तुरचा सलाम. २२ जर कोणी
प्रभूवर प्रीति करीत नाहीं तर तो उत्सृष्ट असो. मारान
अथा (आपला प्रभु आला). २३ प्रभु येशू ख्रिस्ताची
कृपा तुम्हांसह असो. २४ ख्रिस्त येशूमध्यें माझी प्रीति
तुम्हां सर्वांसह असो. आमेन.

# पौलाचें करिंथकरांस दुसरें पत्र



## नमस्कार व ईशोपकारस्मरण

१ करिंथ एथील देवाच्या मंडळीस व तिच्या-
१ सुद्धां अवघ्या अखयांतील सर्व पवित्र जनांस देवाच्या
इच्छेनें ख्रिस्त येशूचा प्रेषित झालेला पौल व आपला
बंधु तीमथ्य यांजकडून; २ देव आपला पिता व प्रभु येशू
ख्रिस्त यांजपासून तुम्हांस कृपा व शांति असो.

३ आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताचा पिता जो देव,
करुणाकर पिता व सर्व सांत्वनदाता देव, तो धन्यवादित

असो. ४ तो आम्हांवरील सर्व संकटांत आमचें सांत्वन करितो, असें कीं ज्या सांत्वनानें आम्हांला स्वतः देवाकडून सांत्वन मिळतें, त्या सांत्वनानें आम्हीं, जे कोणी कोणत्याहि संकटांत आहेत त्यांचें सांत्वन करावयास समर्थ व्हावें. ५ कारण ख्रिस्ताचीं दुःखें जशीं आम्हांस पुष्कळ होतात तसें ख्रिस्ताच्या द्वारें आमचें सांत्वनहि पुष्कळ होतें. ६ आम्हांवर संकट येतें तें तुमचें सांत्वन व तारण व्हावें एतदर्थ येतें; आणि आम्हांला सांत्वन मिळतें तें तुमचें सांत्वन व्हावें एतदर्थ मिळतें; जीं दुःखें आम्ही सोसतों तीं सहन करण्याचे कामीं तुम्हांला तें साधनीभूत होतें. ७ तुम्हांविषयींची आमची आशा सुदृढ अशी आहे; कारण आम्हांस ठाऊक आहे कीं जसे तुम्ही दुःखांचे अंशभागी आहां तसे सांत्वनाचेहि अंशभागी आहां. ८ बंधुजनहो, आसियांत आम्हांवर आलेल्या संकटाविषयीं तुम्हीं अजाण असावें अशी आमची इच्छा नाहीं; तें असें कीं आम्ही आमच्या शक्तीपलीकडे अतिशयच दडपून गेलों; इतकें कीं आम्ही जगूं किंवा जगणार नाहीं असें आम्हांला झालें; ९ फार तर काय, आम्ही मरूंच असें आमचें मन आम्हांस सांगत होतें; आम्हीं स्वतःवर आशा न ठेवितां ती मृतांना सजीव करणाऱ्या देवावर ठेवावी, एतदर्थ हें झालें. १० त्यानें आम्हांस एवढ्या मोठ्या प्राणसंकटांतून सोडविलें, तो आतां सोडवीत आहे, आणि तो आम्हांस यापुढेंहि सोडवील, अशी त्याजवर आमची आशा आहे. ११ तुम्हींहि आम्हांसाठीं प्रार्थना करून आम्हांला साहाय्य करावें; असें कीं जें कृपादान बहुत जणांच्या योगें आम्हांस मिळालें त्याविषयींचें उपकारस्मरण आमच्या वतीनें बहुत जणांनीं करावें.

### पौलाचे शुद्ध हेतु

१२ आम्हांला अभिमान वाळगण्याचें कारण, म्हणजे आमच्या मनाची साक्ष, ही आहे कीं दैहिक ज्ञानानें नव्हे, तर देवाच्या कृपेनें, देवानें दिलेल्या पवित्रतेनें व सात्विकपणानें आम्ही जगांत व विशेषेंकरून तुम्हांबरोबर वागलों. १३ कारण जें तुम्ही वाचतां किंवा कबूल करितां त्यावांचून दुसरें कांहीं आम्ही तुम्हांस लिहीत नाहीं, आणि शेवटपर्यंतहि तुम्ही तें कबूल कराल अशी मला आशा आहे; १४ त्याप्रमाणें तुम्ही कांहीं अंशीं आम्हांकडे कबूल केलें कीं जसें आपल्या प्रभु येशूच्या दिवशीं तुम्ही आमच्या अभिमानाचा विषय आहां तसें आम्ही तुमच्या अभिमानाचा आहों.

### त्याची भेट पुढें ढकलण्यांत आली

१५ असा भरंवसा बाळगून तुम्हांस दोनदा अनुग्रहदान मिळावें म्हणून, तुम्हांकडे पहिल्यानें यावें, १६ तुम्हांकडून मासेदोनियास जावें, नंतर पुनः मासेदोनियाहून तुम्हांकडे यावें, आणि तुम्हीं मला यहूदीयाकडे वाटेस लावावें, असा माझा बेत होता. १७ तर असा बेत असतां मीं चंचलपणा केलें काय ? अथवा मला होय होय म्हणतां यावें आणि नाहीं नाहींहि म्हणतां यावें म्हणून जें मी योजितों तें देहस्वभावाप्रमाणें योजितों काय ? १८ देव विश्वासू आहे, आमचें तुम्हांबरोबरचें बोलणें, होय नाहीं असें नाहीं. १९ कारण देवाचा पुत्र येशू ख्रिस्त ह्याची घोषणा आम्हांकडून, म्हणजे मी, सिल्वान व तीमथ्य यांजकडून, तुम्हांमध्यें झाली ती होय नाहीं अशी झाली नाहीं, तर त्याच्यामध्यें होय हेंच झालें; २० देववचनें कितीहि असोत, त्यामध्यें ( ख्रिस्तामध्यें ) होय हें आहे; यामुळें आमच्या हातून देवाचें गौरव व्हावें म्हणून त्याच्या द्वारें आमेन हेंहि आहे. २१ जो आम्हांस अभिषेक करून तुम्हांसह ख्रिस्तामध्यें सुदृढ करितो तो देव आहे; २२ त्यानें आम्हांवर शिक्काहि केला व आमच्या अंतःकरणांत आत्मा हा विसार दिला.

२३ देवाला साक्षी ठेवून मी आपल्या जिवाची शपथ घेतों कीं मीं करिंथास येणें रहित केलें, ह्यांत तुमची गय केली. २४ आम्ही तुमच्या विश्वासावर सत्ता करितों असें नाहीं, तर तुमच्या आनंदाचे सहकारी आहों, तुमची स्थिति आहे ती विश्वासानें आहे.

२ १ मीं आपल्या ठायीं निश्चय केला होता कीं तुम्हांकडे दुःख देण्यास फिरून येऊं नये. २ कारण जर मी तुम्हांस दुःख देतों तर ज्याला मजपासून दुःख होतें त्याच्यावांचून मला आनंद देणारा कोण आहे ? ३ मीं हेंच तुम्हांस लिहिलें होतें, यासाठीं कीं मी आल्यावर, ज्यांच्यापासून मला आनंद व्हावयाचा त्यांजपासून

मला दुःख होऊं नये; मला तुम्हां सर्वांविषयीं असा भरवसा आहे कीं माझा आनंद तो तुम्हां सर्वांचा आनंद आहे. ४ मीं फार संकटांत व मनस्तापांत असतांना अश्रु गाळीत तुम्हांस लिहिलें होतें; तुम्हीं दुःखी व्हावें म्हणून नाहीं, तर तुम्हांवर माझी जी विशेष प्रीति आहे ती तुम्हीं ओळखावी म्हणून लिहिलें.

### पश्चात्ताप केलेल्यास क्षमा करणें

५ कोणीं दुःख दिलें असेल तर त्यानें तें मलाच नाहीं, तर कांहीं अंशीं (मी कडक होऊं इच्छीत नाहीं) तुम्हां सर्वांला दिलें. ६ अशा मनुष्याला मोठ्या पक्षानें दिलेली शिक्षा पुरे. ७ त्या मनुष्यानें आपल्या दुःखातिशयांत बुडून जाऊं नये म्हणून तुम्हीं उलट त्याला क्षमा करून त्याचें सांत्वन करावें, हें बरें. ८ यामुळें मी तुम्हांस विनंति करितों कीं तुम्हीं त्याजवर प्रीति करण्याचें ठरवा. ९ हें मीं यासाठीं लिहिलें होतें कीं तुम्ही सर्व प्रकारें आज्ञांनुसारी आहां कीं नाहीं याचें मला प्रमाण पटावें. १० तुम्ही एकाद्याला कशाबद्दल तरी क्षमा करितां त्याला त्याची मीहि क्षमा करितों, कारण मीं कशाची क्षमा केली असली तर ज्या कशाची क्षमा केली ती तुम्हांकरितां ख्रिस्तासमक्ष केली आहे; ११ यासाठीं कीं सैतानाचें आपल्यावर वर्चस्व होऊं नये; त्याचे विचार आपल्याला कळत नाहींत असें नाहीं.

### शुभवृत्तामुळें उद्भवणारीं संकटें व जयोत्सवाचे प्रसंग

१२ असो; मी ख्रिस्ताची सुवार्ता सांगण्यासाठीं त्रोवास आल्यावर मला प्रभूमध्यें दार उघडलें; १३ तेव्हां माझा बंधु तीत मला भेटला नाहीं, म्हणून माझ्या जिवाला चैन पडलें नाहीं. मग तेथल्या लोकांचा निरोप घेऊन मी मासेदोनियांत निघून गेलों.

१४ जो देव आम्हांस सर्वदा ख्रिस्तामध्यें जयोत्सवानें नेतो, आणि सर्व ठिकाणीं आमच्या द्वारें आपल्याविषयींच्या ज्ञानाचा सुगंध प्रकट करितो, त्याची स्तुति असो. १५ तारणप्राप्ति होत असलेले आणि नाश होत असलेले अशा लोकांसंबंधानें आम्ही देवाला ख्रिस्ताचा सुगंध असे आहों; १६ एकाला मृत्यूचा मारक गंध आणि एकाला जीवनाचा जीवनदायक गंध आहों. हें कार्य करावयास कोण लायक आहे? १७ पुष्कळ लोक देवाच्या वचनांत भेळ करून तें बिघडवून टाकितात तसे आम्ही नाहीं, तर जसें सात्त्विकपणानें व देवाच्या द्वारा बोलावें तसें आम्ही देवासमक्ष ख्रिस्तामध्यें बोलणारे आहों.

### ख्रिस्तानुयायी लोकच पौलाची शिफारसपत्रें आहेत

३ १ आम्ही आपली वाखाणणूक पुनः करूं लागलों आहों काय? अथवा जशीं कित्येकांस तशीं आम्हांस तुम्हांकडे किंवा तुम्हांपासून शिफारसपत्रें पाहिजेत काय? २ तुम्हीच आमचें पत्र, आमच्या अंतःकरणांवर लिहिलेलें, सर्व मनुष्यांना कळलेलें व त्यांनीं वाचलेलें, असें आहां; ३ शाईनें नव्हे, तर सदाजीवी देवाच्या आत्म्यानें लिहिलेलें, 'दगडी पाट्यांवर नव्हे, तर मांसमय अंतःकरणरूपी पाट्यांवर लिहिलेलें,' आमच्या सेवेच्या योगें सिद्ध झालेलें ख्रिस्ताचें पत्र, असें तुम्ही प्रसिद्ध होत आहां. ४ असा देवासंबंधीं भरवसा आम्हांस ख्रिस्ताच्या द्वारें आहे; ५ आम्ही स्वतः कोणतीहि गोष्ट आपण होऊनच ठरविण्यापुरते समर्थ आहों असें म्हणत नाहीं, आमचें सामर्थ्य देवापासून आहे; ६ त्यानेंच आम्हांस नव्या कराराचे सेवक होण्यासाठीं समर्थ केलें; तो करार लेखी नव्हे, तर आध्यात्मिक आहे; कारण लेख जिवें मारितो, आत्मा जीवंत करितो.

### नियमशास्त्रवैभवापेक्षां शुभवृत्तवैभव अधिक तेजस्वी

७ जिचा लेख दगडांवर कोरलेला असून जिचें पर्यवसान मृत्यूंत होत असे ती सेवा एवढी तेजस्वी होती कीं 'मोशाच्या तोंडाचें तेज' नाहींसें होत चाललें असूनहि इस्राएल लोकांना त्याच्या तोंडाकडे दृष्टि लावेना; ८ तर आध्यात्मिक सेवा विशेषतः तेजस्वी होणार नाहीं काय? ९ कारण ज्या सेवेचा परिणाम दंडाज्ञा ती तेजोमय होती, तर जिचा परिणाम नीतिमत्त्व ती विशेषतः फारच अधिक तेजोमय असणार. १० इतकेंच नव्हे, तर 'जें तेजस्वी होतें तें' या तुलनेंत अति तेजामुळें 'तेजोहीन झालें.' ११ नष्ट होत चाललेलें जर तेजयुक्त आहे तर जें टिकाऊ तें विशेषतः तेजस्वी असणार.

१२ तर मग आम्हांस अशी आशा असल्यामुळें आम्ही
फार प्रशस्तपणें बोललों; १३ इस्राएल लोकांनीं नाहींशा
होणाऱ्या गोष्टीच्या अंतावर दृष्टि लावूं नये म्हणून
मोशे 'आपल्या मुखावर आच्छादन घालीत असे'
तसें आम्ही करीत नाहीं; १४ परंतु त्यांचीं मनें
कठीण झालीं; कारण जुना करार वाचण्यांत येतो
तेव्हां तेंच आच्छादन आजपर्यंत तसेंच न काढि-
लेलें राहतें; तें ख्रिस्तामध्यें नाहींसें होतें. १५ आजपर्यंत
मोशाचा ग्रंथ वाचण्यांत येतो तेव्हां त्यांच्या अंतःकरणावर
आच्छादन राहतें; १६ 'परंतु ते प्रभूकडे वळले
म्हणजे आच्छादन काढिलें जातें,' १७ प्रभु आत्मा आहे;
आणि जेथें प्रभूचा आत्मा आहे तेथें मोकळीक आहे. १८
परंतु आपल्या मुखांवर आच्छादन नसून आपण सर्व जण
आरशाप्रमाणें प्रभूच्या वैभवाचें प्रतिबिंब पाडीत आहों आणि
प्रभु जो आत्मा त्याच्या द्वारें, तेजस्वितेच्या परंपरेनें,
आपलें रूपांतर होत असतां आपण त्याच्याशीं समरूप
होत आहों.

## प्रांजळपणें शुभवर्तमान गाजविणें

४ १ यास्तव आम्हांवर दया झाल्याप्रमाणें ही सेवा
आम्हांस दिली आहे, म्हणून आम्ही धैर्य सोडीत
नाहीं; २ आम्हीं लज्जेच्या गुप्त गोष्टी वर्जिल्या आहेत,
आम्ही कपटानें चालत नाहीं व देवाच्या वचनाविषयीं
कपट करीत नाहीं; तर सत्य प्रकट करून देवासमक्ष प्रत्येक
मनुष्याच्या मनाला आपणांस पटवितो. ३ आमची सुवार्ता
आच्छादिलेली असल्यास ज्यांचा नाश होत आहे त्यांच्या
ठायीं ती आच्छादिलेली आहे. ४ त्यांजविषयीं या युगाच्या
देवानें विश्वास न ठेवणाऱ्या लोकांचीं मनें अंधळीं केलीं
आहेत, यासाठीं कीं देवाची प्रतिमा जो ख्रिस्त त्याच्या
तेजाच्या सुवार्तेचा प्रकाश त्यांवर प्रकाशूं नये. ५ आम्ही
आपलें नव्हे, तर ख्रिस्त येशू हा प्रभु असें त्याचें घोषण
करितों, आणि येशूमुळें आम्ही तुमचे दास असें स्वतःचें
घोषण करितों. ६ अंधारांतून उजेड प्रकाशित होईल असें
जो देव बोलला तो, येशू ख्रिस्ताच्या मुखावरील देवाच्या
तेजाचें ज्ञान प्रकाशित करावें म्हणून, आमच्या अंतःकर-
णांत प्रकाशला आहे.

## प्रेषितांची शक्तिहीनता व देवाचें सामर्थ्य

७ ही आमची संपत्ति मातीच्या भांड्यांत आहे,
यासाठीं कीं सामर्थ्याची पराकाष्ठा देवाची आहे, आमच्या
द्वारा होत नाहीं, हें समजावें. ८ आम्हांवर चोहोंकडून संकटें
आलीं तरी आम्ही संकुचित झालों नाहीं; घोटाळ्यांत
पडलों तरी निराश झालों नाहीं; ९ आमचा पाठलाग झाला
तरी आमचा परित्याग करण्यांत आला नाहीं; आम्ही खालीं
पाडलेलें आहों तरी आमचा नाश झाला नाहीं; १० आम्ही
येशूचा वध सर्वदा शरीरांत वागवितों; यासाठीं कीं येशूचें
जीवनहि आमच्या शरीरांत प्रकट व्हावें. ११ कारण जे
आम्ही जीवंत राहतों ते येशूमुळें मरणाला सदासर्वदा
सोपलें जात आहों, यासाठीं कीं येशूचें जीवनहि आमच्या
मर्त्य देहांत प्रकट व्हावें. १२ आम्हांमध्यें मरण, पण
तुम्हांमध्यें जीवन आपलें कार्य चालवितें. १३ 'मीं विश्वास
धरिला म्हणून बोललों,' या शास्त्रलेखानुसार जो विश्वासाचा
आत्मा तोच आत्मा आमच्या ठायीं असल्यामुळें आम्ही
विश्वास धरितों आणि त्यामुळें बोलतोंहि. १४ हें आम्हांस
ठाऊक आहे कीं ज्यानें प्रभु येशूला उठविलें तो येशूबरोबर
आम्हांसहि उठवील व तुमच्याबरोबर सादर करील. १५
सर्व कांहीं तुम्हांकरितां आहे, यासाठीं कीं जी कृपा पुष्कळ
जणांवर होऊन विपुल झाली ती देवाच्या गौरवार्थ अपार
आभारप्रदर्शन होण्यासाठीं साधनीभूत व्हावी.

## क्षणिक दुःख पण सार्वकालिक वैभव

१६ यास्तव आम्ही धैर्य सोडीत नाहीं; आमचा बाह्य
देह क्षय पावत आहे, तरी अंतरात्मा दिवसेंदिवस नवा
होत आहे. १७ कारण आम्हांवर येणारें क्षणिक व अल्प
संकट हें आम्हांसाठीं अत्यंत मोठ्या प्रमाणांत अनंतकालिक
गौरवाचा भार उत्पन्न करितें; १८ आम्ही दृश्य वस्तूंकडे
नाहीं तर अदृश्य वस्तूंकडे लक्ष लावितों; कारण दृश्य वस्तु
क्षणिक आहेत, पण अदृश्य वस्तु अनंतकालिक आहेत.

५ १ कारण आम्हांस ठाऊक आहे कीं आमचें
पृथ्वीवरील मंडपरूपी गृह मोडलें तरी स्वर्गांत आम्हांला
देवापासून मिळालेलें एक गृह आहे; तें हातांनीं न
बांधिलेलें, अनंतकालिक असें आहे. २ या गृहांत असतांना
आम्ही स्वर्गीय गृहरूप वस्त्र परिधान करण्याच्या उत्कंठेनें

कण्हतों; ३ आम्ही अशा प्रकारें परिधान केलेले असलों
म्हणजे आम्ही उघडे सांपडणार नाहीं. ४ कारण जे आम्ही
या मंडपांत आहों ते आम्ही भाराक्रांत होऊन कण्हतों; वस्त्र
काढून टाकावें अशी आमची इच्छा आहे असें नाहीं, तर
परिधान करावें अशी इच्छा बाळगतों; यासाठीं कीं जें मर्त्य
आहे तें जीवनाच्या योगें ग्रासलें जावें. ५ ज्यानें आम्हांस
याकरितां सिद्ध केलें तो देव आहे; त्यानें आम्हांस आत्मा
विसार असा दिला आहे. ६ यास्तव आम्ही सर्वदा धैर्य
धरितों; आणि हें लक्षांत बाळगतों कीं आम्ही शरीरांत वास
करीत आहों तोंवर आम्ही प्रभूपासून दूर असलेले असे
प्रवासी आहों. ७ (आम्हीं विश्वासानें चालतों, डोळ्यांनीं
दिसतें त्याप्रमाणें चालत नाहीं); ८ आम्ही धैर्य धरितों,
आणि शरीराबाहेरचे प्रवासी असून प्रभूसह गृहवास करणें
हें आम्हांस अधिक बरें वाटतें. ९ यास्तव आम्ही गृहवासी
असलों किंवा प्रवासी असलों तरी त्याला संतुष्ट करण्याची
आमची हौस आहे. १० कारण आपणां सर्वांस ख्रिस्ताच्या
न्यायासनासमोर खऱ्या स्वरूपानें प्रकट झालें पाहिजे,
यासाठीं कीं प्रत्येकाला, त्यानें देहानें केलेल्या गोष्टींचें फळ
मिळावें; मग त्या बऱ्या असोत किंवा वाईट असोत.

## ख्रिस्ताची प्रीति आम्हांला आवरून धरते

११ यास्तव आम्ही प्रभूच्या भयाची जाणीव बाळगून
मनुष्यांची समजूत घालितों; देवाला तर आम्ही प्रकट आहों;
आणि तुमच्या मनांतहि प्रकट झालों आहों अशी आशा
मी धरितों. १२ आम्ही तुम्हांजवळ आपली प्रशंसा पुनः
करीत नाहीं, तर तुम्हांस आम्हांविषयीं अभिमान बाळग-
ण्याचा प्रसंग मिळावा म्हणून असें बोलतों; यासाठीं कीं जे
अंतःकरणांत नव्हे तर तोंडावर अभिमान बाळगितात त्यांस
तुम्हांला उत्तर देतां यावें. १३ आम्ही भ्रमिष्ट झालों असलों
तर तें देवासाठीं, आणि आम्ही शुद्धीवर असलों तर तें
तुम्हांसाठीं आहों. १४ ख्रिस्ताची प्रीति आम्हांस आवरून
धरिते. आम्ही असें समजतों कीं एक सर्वांसाठीं मेला तर
सर्व मेले; १५ आणि तो सर्वांसाठीं याकरितां मेला कीं
जे जगतात त्यांनीं पुढें स्वतःकरितां नव्हे तर त्याच्यासाठीं
जो मेला व उठला त्याच्याकरितां जगावें.

## ख्रिस्ताठायीं राहिल्यानें नवजीवन

१६ आतांपासून आम्ही कोणाला देहावरून ओळखत
नाहीं; आणि जरी आम्हीं ख्रिस्ताला देहावरून ओळखलें
होतें तरी आतां यापुढें त्याला तसें ओळखत नाहीं.
१७ जर कोणी ख्रिस्ताच्या ठायीं आहे तर तो नवी उत्पत्ति
आहे; जुनें तें होऊन गेलें; पाहा, तें नवें झालें आहे.
१८ हें सर्व देवापासून आहे; त्यानें आपणाबरोबर तुमचा
आमचा समेट ख्रिस्ताच्या द्वारें केला, आणि समेटाची
सेवा आम्हांस दिली; १९ म्हणजे जगांतील लोकांचीं
पातकें त्यांजकडे न मोजतां, देव ख्रिस्तामध्यें आपणा-
बरोबर जगाचा समेट करीत होता; आणि त्यानें आम्हांकडे
समेटाचें वचन सोपवून दिलें.

## समेटाचा संदेश

२० यास्तव देव आम्हांकडून बोध करवीत असल्या-
सारखें आम्ही ख्रिस्ताच्या वतीनें वकिली करितों; देवा-
बरोबर समेट केलेले असे तुम्ही व्हावें अशी आम्ही
ख्रिस्ताच्या वतीनें विनंति करितों. २१ ज्याला पाप ठाऊक
नव्हतें त्याला त्यानें तुमच्याआमच्याकरितां पाप असें केलें,
यासाठीं कीं आपण त्याच्याठायीं देवाचें नीतिमत्त्व
असें व्हावें.

६ १ आम्ही त्याच्यासह कार्य करीत आहों; म्हणून
विनंति करितों कीं तुम्हीं देवाच्या कृपेचा स्वीकार
व्यर्थ होऊं देऊं नये; २ (कारण तो म्हणतो : प्रसाद-
समयीं मीं तुझें ऐकलें,
व उद्धारदिनीं मीं तुला साहाय्य केलें;
पाहा, आतांच 'प्रसादसमय;' पाहा, आतांच 'तारणाचा
दिवस' आहे;) ३ आमच्या सेवेला दोष लागूं नये
म्हणून आम्ही कोणत्याहि प्रकारें अडखळण्याचें कारण
होत नाहीं; ४ तर सर्व गोष्टींत देवाच्या सेवकांप्रमाणें
आम्ही आपणांस पटवितों; फार सहनशीलतेनें, संकटांनीं,
विपत्तीनें, पेचांनीं, ५ फटक्यांनीं, बंदिवासांनीं, दंग्यांनीं,
कष्टांनीं, जागरणांनीं, उपासांनीं; ६ शुद्धतेनें, ज्ञानानें,
क्षमेनें, ममतेनें; पवित्र आत्म्यानें, निष्कपट प्रीतीनें,
७ सत्याच्या वचनानें, देवाच्या सामर्थ्यानें; उजवीडावी-
कडील न्यायत्वाच्या शस्त्रास्त्रानें, ८ गौरवानें व अपमा-

नानें, अपकीर्तीनें व सत्कीर्तीनें, आम्ही आपली लायकी
पटवितों; आम्ही फसविणारे मानिलेले तरी खरे;
९ अप्रसिद्ध मानिलेले तरी सुप्रसिद्ध; 'मरणोन्मुख' असे
मानिलेले तरी पाहा, 'आम्ही जीवंत आहों;' 'शिक्षा
भोगणारे' असे मानिलेले 'तरी जिवें मारलेले नाहीं;'
१० दुःखी असलेले तरी सर्वदा आनंद करणारे; दरिद्री
मानिलेले तरी बहुतांस सधन करणारे; कफल्लक असे
मानिलेले तरी सर्ववस्तुसंपन्न, अशी आम्ही आपली लायकी
पटवितों.

## प्रेमभाव दाखवावा म्हणून विनंति

११ अहो करिंथकरांनो, तुम्हांबरोबर बोलण्यास आमचें
तोंड मोकळें झालें आहे, आमचें 'अंतःकरण विस्तीर्ण
आहे.' १२ तुम्हांविषयीं आमचें अंतःकरण संकुचित
नाहीं, तुमचींच अंतःकरणें संकुचित आहेत. १३ तर
तुम्हीहि आमची फेड करण्यासाठीं आपलीं अंतःकरणें
तशींच विस्तीर्ण करा, हें मी तुम्हांस आपलीं मुलें असें
समजून सांगतों.

## देवभक्त नसलेल्यांशीं मैत्री करूं नये म्हणून इशारा

१४ तुम्ही विश्वास न ठेवणाऱ्यांबरोबर जडून विजोड
होऊं नका; कारण धर्म व अधर्म यांची भागी कशी
होणार? उजेड व अंधार यांचा कसा मिलाफ होणार?
१५ ख्रिस्ताचें बलियालाबरोबर कसें ऐक्य होणार? विश्वास
ठेवणारा व विश्वास न ठेवणारा हे कसे वांटेकरी होणार?
१६ देवाच्या मंदिराचा मूर्तींबरोबर मेळ कसा बसणार?
आपण सदाजीवी देवाचें मंदिर आहों; देवानें असें म्हटलें
आहे कीं 'मी त्यांत निवास करीन व चालेन; मी त्यांचा
देव होईन, व ते माझे लोक होतील.'
१७ यास्तव

त्यांतून निघा व वेगळे व्हा,
असें प्रभु म्हणतो;
आणि अशुद्ध वस्तूला शिवूं नका;
म्हणजे मी तुम्हांस स्वीकारीन;
१८ आणि मी तुम्हांस पिता असा होईन,
आणि तुम्ही मला पुत्र व कन्या अशीं व्हाल,

असें सर्वसत्ताधारी प्रभु म्हणतो. १ यास्तव प्रिय-
७ जनहो, आपणांला हीं वचनें मिळालीं आहेत म्हणून
देहाला व आत्म्याला अशुद्ध करणाऱ्या सर्वांपासून
आपण स्वतःला शुद्ध करावें आणि देवाचें भय बाळगून
पावित्र्याची परिपूर्ति करावी.

## तीताच्या येण्यानें आलेलें उत्तेजन

२ तुम्ही आपल्या अंतःकरणांत आम्हांस जागा द्या;
आम्हीं कोणाचा अन्याय केला नाहीं, कोणाला बिघडविलें
नाहीं, कोणाला ठकविलें नाहीं. ३ तुम्हांला दोषी ठरविण्या-
साठीं मी हें म्हणत नाहीं; कारण मीं पूर्वी सांगितलें आहे
कीं तुम्हांबरोबर मरणें व तुम्हांबरोबर जीवंत राहणें ह्याची
जाणीव आमच्या अंतःकरणांत आहे. ४ मला तुमचा
मोठा भरवसा आहे; मला तुमचा फार अभिमान आहे; मी
सांत्वनानें भरलों आहें; आमच्या सर्व संकटांत मला
आनंदाचें भरतें आलें आहे.

५ आम्ही मासेदोनियांत आल्यावरहि आम्हांला शारी-
रिक स्वस्थपणा नव्हता, तर आम्ही चहूंकडून संकटांत
होतों; बाहेर भांडणें, आंत भीतिदायक गोष्टी होत्या. ६
तथापि दीनांचें सांत्वन करणारा देव यानें तीताच्या
येण्यानें आमचें सांत्वन केलें; ७ आणि त्याच्या येण्यानें
केवळ नाहीं तर तुमची उत्कंठा, तुमचा शोक, तुमची
मजविषयींची आस्था ह्यासंबंधानें आम्हांस सांगतांना,
तुमच्यासंबंधींचें त्याचें जें सांत्वन झालें त्याच्या योगानें
आमचें सांत्वन होऊन मला विशेष आनंद प्राप्त झाला.
८ मीं आपल्या पत्रानें तुम्हांस दुःख दिलें याचा मला
पस्तावा होत नाहीं; मला पस्तावा झाला होता खरा; कारण
त्या पत्रापासून तुम्हांस कांहीं वेळ तरी दुःख झालें असें
मला कळतें. ९ तरी आतां मी आनंद करितों; तुम्हांस
दुःख झालें यामुळें नव्हे, तर पश्चात्ताप होण्याजोगें दुःख
झालें ह्यामुळें; कारण देवाच्या योजनेप्रमाणें तुमच्या
दुःखाचा हा प्रकार होता; आमच्या हातून कोणत्याहि
गोष्टींत तुमची हानि होऊं नये म्हणून असें झालें. १०
देवयोजनेप्रमाणें होणारें दुःख तारणदायी पश्चात्ताप उत्पन्न
करितें; त्यापासून पस्तावा होत नाहीं; पण ऐहिकरीत्या
होणारें दुःख मरण उत्पन्न करितें. ११ कारण पाहा,

देवाच्या योजनेप्रमाणें तुमच्या दुःखाचा प्रकार होता;
याच गोष्टीनें तुम्हांस केवढी कळकळ, केवढें दोष-
निवारण, केवढा संताप, केवढें भय, केवढी उत्कंठा, केवढी
आस्था, केवढी शिक्षा करण्याची बुद्धि, हीं उत्पन्न
झालीं ! या कामांत तुम्ही सर्व प्रकारें, निर्दोष आहां
ह्याचें प्रमाण तुम्हीं पटविलें. १२ मीं तुम्हांस लिहिलें तें
ज्यानें अन्याय केला त्याच्यासाठीं नव्हे, आणि ज्याचा
अन्याय झाला त्याच्यासाठींहि नव्हे, तर आम्हांविषयीं
तुम्ही दाखवीत आहां त्या कळकळीची जाणीव देवाच्या
दिसण्यांत तुम्हांस व्हावी म्हणून लिहिलें. १३ यामुळें
आम्हांस सांत्वन मिळालें आहे; आणि आम्हांस सांत्वन
मिळालें इतकेंच नव्हे, तर विशेषेंकरून तीताच्या आनंदानें
आम्हांस फारच आनंद झाला; कारण तुम्हां सर्वांकडून
त्याच्या आत्म्याला प्रफुल्लता आली आहे. १४ मीं
त्याच्याजवळ तुम्हांविषयीं कसलाहि अभिमान बाळगला
तरी तो मला लाजविणारा झाला नाहीं; तर आम्ही
तुम्हांबरोबर सर्व गोष्टी खरेपणानें बोललों, त्याप्रमाणें
तीताजवळ आम्हीं अभिमानयुक्त केलेलें भाषणहि खरें
ठरलें; १५ आणि तुम्हीं सर्वांनीं भीत भीत व कांपत
कांपत त्याचा स्वीकार करून आज्ञांकितपणा दर्शविला
त्याची तो आठवण करितो; म्हणून तुम्हांविषयींची त्याची
ममता अधिक आहे. १६ मला सर्व प्रकारें तुमचा भर-
वसा आहे, म्हणून मी आनंद करितों.

### यरुशलेमाच्या गोरगरिबांसाठीं वर्गणी

८ १ बंधुजनहो, मासेदोनियांतील मंडळ्यांवर
झालेली देवाची कृपा आम्ही तुम्हांस कळवितों; २
ती अशी कीं संकटाच्या मोठ्या परीक्षेंत त्यांच्या
आनंदाचा अतिरेक व त्यांचें अत्यंत दारिद्र्य, यांमध्यें
त्यांची औदार्यसंपत्ति विपुल झाली. ३ कारण त्यांनीं शक्ती-
प्रमाणें व शक्तीपलीकडेहि आपण होऊन दान दिलें अशी
मी साक्ष देतों. ४ त्यांनीं फार विनंति करून आम्हांजवळ
मागितलें कीं पवित्र जनांची सेवा करण्यांत आम्हांस
अंशभागी करण्याची कृपा व्हावी; ५ आम्हांस अपेक्षा
होती तेवढेंच नाहीं, तर त्यांनीं प्रथम आपणांस प्रभूला
दिलें, आणि देवाच्या इच्छेनें आपणांस आम्हांलाहि दिलें.
६ ह्यावरून आम्हीं तीताजवळ विनंति केली कीं जसा
त्यानें पूर्वी आरंभ केला होता त्याप्रमाणें तुम्हांमध्यें कृपेच्या
ह्या कार्याची पूर्णताहि करावी. ७ तर विश्वास, भाषण,
ज्ञान, प्रत्येक गोष्टीची कळकळ, व आम्हांवरील तुमची प्रीति
या सर्वांची जशी तुम्हांमध्यें विपुलता आहे तशी कृपेच्या
ह्या कार्याचीहि असावी.

### प्रभु येशूचें उदाहरण

८ हें मी आज्ञा म्हणून सांगत नाहीं, तर दुसऱ्यांच्या
ठायीं दिसून येणाऱ्या आस्थेवरून तुमच्या प्रेमाच्या
खरेपणाची परीक्षा मी पाहतों. ९ आपल्या प्रभु येशू
ख्रिस्ताची कृपा तुम्हांला माहीत आहे; तो धनवान्
असतां तुम्हांकरितां दरिद्री झाला, यासाठीं कीं त्याच्या
दारिद्र्यानें तुम्हीं धनवान् व्हावें. १० याविषयीं मी आपलें
मत सांगतों; ह्याचा तुम्हांस उपयोग होण्यासारखा आहे;
कारण तुम्ही एका वर्षामागें इतरापूर्वी असें करण्यास आरंभ
केला, इतकेंच नव्हे, तर अशी इच्छा बाळगण्यासहि केला.
११ तर आतां हें कार्य पूर्ण करा; ह्यासाठीं कीं जशी
इच्छेची उत्सुकता तुम्हांस होती तशी तुमच्या प्राप्तीप्रमाणें
कार्यसिद्धि व्हावी. १२ उत्सुकता असली म्हणजे जसें
ज्याजवळ असेल तसें तें मान्य होतें; जें नसेल त्याप्रमाणें नाहीं.
१३ दुसऱ्यांस सुख व तुम्हांस दुःख व्हावें असें नाहीं.
१४ तर हें समानतेनें व्हावें, म्हणजे प्रस्तुत काळीं
तुमच्या भरपुरींतून त्यांची गरज भागावी, आणि पुढें त्यांच्या
भरपुरींतून तुमची गरज भागावी, अशी ही समानता
व्हावी; १५ ‘ज्यानें फार गोळा केलें होतें त्याचें अधिक
भरलें नाहीं; तसेंच ज्यानें थोडें गोळा केलें होतें त्याचें
कांहीं कमी भरलें नाहीं,’ असें शास्त्रांत लिहिलें आहे.

### तीत व इतर यांची कामगिरीवर पाठवणी

१६ तीताच्या मनांत तुम्हांविषयीं तशीच कळकळ
उत्पन्न करणाऱ्या देवाची स्तुति असो. १७ त्यानें आमची
सूचना मान्य केली; तरी तो स्वतः फार उत्सुक
असल्यामुळें आपण होऊन तुम्हांकडे निघून गेला.
१८ त्याच्याबरोबर आम्हीं एका बंधूला पाठविलें आहे;
सुवार्तेसंबंधीं त्याची प्रशंसा सर्व मंडळ्यांतून पसरली आहे;
१९ इतकेंच केवळ नाहीं, तर आम्हांकडून प्रभूच्या गौरवा-

साठीं व आमची उत्सुकता पटविण्यासाठीं चालविलेल्या कृपेच्या ह्या कार्यांत मंडळ्यांनीं आमच्या प्रवासांत त्याला सोबती म्हणून नेमिलें; २० आम्हांकडून चालविलेल्या ह्या औदार्याच्या कार्यांत कोणीं आम्हांला दोष लावूं नये म्हणून तजवीज केली आहे; २१ कारण 'प्रभूच्या दृष्टीनें जें मान्य,' इतकेंच नव्हे तर 'मनुष्याच्या दृष्टीनेंहि जें मान्य' त्याची आम्ही काळजी घेत असतों. २२ त्यांच्याबरोबर आम्हीं आमच्या दुसऱ्या एका बंधूला पाठविलें आहे, त्याच्या उत्सुकतेची परीक्षा आम्हीं पुष्कळ गोष्टींत अनेक वेळां केली आहे; त्याचा आतां तुम्हांवर फार भरवसा असल्यामुळें तो अधिक उत्सुक आहे असें आम्हांस पटलें आहे. २३ तीताविषयीं कोणी विचारील तर तो माझा साथी व तुमच्याकरितां माझा सहकारी आहे; आमचे बंधु म्हटले तर ते मंडळ्यांचे प्रेषित, ख्रिस्ताचें गौरव असे आहेत. २४ यास्तव त्यांस तुम्ही आपल्या प्रीतीचें आणि तुम्हांविषयींच्या आमच्या अभिमानाचें प्रमाण मंडळ्यांसमक्ष दाखवा.

९ १ पवित्र जनांची सेवा करण्याविषयीं मीं तुम्हांस लिहावें ह्याचें अगत्य नाहीं; २ कारण मला तुमची उत्सुकता ठाऊक आहे; तिच्यावरून मासेदोनियांतील लोकांजवळ मी तुम्हांविषयीं अभिमानानें म्हणत आहें कीं अखया एका वर्षामागेंच तयार झाली. आणि या तुमच्या आस्थेनें त्यांतील बहुतेकांस उत्तेजन प्राप्त झालें आहे. ३ तरी या बाबतींत तुम्हांविषयींचा आमचा अभिमान व्यर्थ होऊं नये म्हणून मीं ह्या बंधूंस पाठविलें आहे, यासाठीं कीं मीं सांगितलें होतें तसें तुम्हीं तयार असावें; ४ नाहीं तर कदाचित् कोणी मासेदोनियाकर माझ्याबरोबर आले आणि तुम्ही तयार नाहीं असें त्यांनीं पाहिलें, तर या भरवशाविषयीं आमची (तुमची म्हणत नाहीं) फजिती होईल. ५ यास्तव तुमचें पूर्वीं देऊं केलेलें उपकारक दान जमा करण्याची व्यवस्था करावी; तें कृपणतेनें नव्हे तर उपकारबुद्धीनें दिलेलें असें तयार असावें, म्हणून अगाऊ तुम्हांकडे जाण्याची बंधुवर्गाजवळ विनंति करणें मला जरूरीचें वाटलें.

### वर्गणी कशी द्यावी

६ हें ध्यानांत आणा कीं जो हात राखून पेरितो तो त्याच मानानें त्याची कापणी करील; आणि जो सढळ हातानें पेरितो तो त्याच हातानें त्याची कापणी करील. ७ प्रत्येकानें आपापल्या मनांत ठरविल्याप्रमाणें द्यावें; दुःखानें किंवा जरूर पडते म्हणून देऊं नये; कारण 'संतोषानें देणारा देवाला' आवडतो. ८ सर्व प्रकारची कृपा तुम्हांवर विपुल होऊं देण्यास देव शक्तिमान् आहे; यासाठीं कीं तुम्हांस सर्व गोष्टींत सगळा पुरवठा नेहमीं होऊन प्रत्येक चांगल्या कामासाठीं तुम्हांजवळ सर्व कांहीं विपुल व्हावें.

९ त्यानें चहूंकडे दिलें आहे; गरिबांस दानधर्म केला आहे; त्याची धार्मिकता युगानयुग राहते, असें शास्त्रांत लिहिलें आहे. १० जो 'पेरणाऱ्याला बीं' पुरवितो व 'खाण्याकरितां अन्न' पुरवितो तो तुम्हांस बीं पुरवील व तें पुष्कळ करील आणि 'तुमच्या धार्मिकतेचें फळ वाढवील;' ११ म्हणजे तुम्ही सर्व प्रकारच्या औदार्यासाठीं सर्व गोष्टींनीं धनसंपन्न व्हाल; त्या औदार्यावरून आमच्या द्वारें देवाचें आभारप्रदर्शन होतें. १२ ही सेवा केल्यानें पवित्र जनांच्या गरजा पुरविल्या जातात; इतकेंच केवळ नव्हे, तर देवाचें फार आभारप्रदर्शन केल्यानें ती अतिशय होते; १३ या सेवेच्या योगें तुमची लायकी पटते; तुम्हीं ख्रिस्तसुवार्तेच्या केलेल्या पत्करानें इमानेंइतबारें वागतां; यामुळें, आणि त्यांच्यासाठीं व सर्वांसाठीं दान देण्याचें जें तुमचें औदार्य यामुळें, ते देवाचा महिमा वर्णितात; १४ आणि तुम्हांवर देवाची अतिशय कृपा असल्यामुळें ते तुम्हांकरितां प्रार्थना करितात व तुमच्या भेटीविषयीं उत्कंठित आहेत. १५ देवाच्या अवर्णनीय दानाबद्दल त्याची स्तुति असो.

### प्रेषित म्हणून आपला अधिकार आपल्याला देवापासून प्राप्त झालेला आहे असें पौल जोरानें सांगतो

१० १ मी पौल तुम्हांसमक्ष व तुम्हांमध्यें असतांना लीन असतों, तोच मी दूर असलों म्हणजे तुम्हांबरोबर कडकपणानें वागतों; तो मी ख्रिस्ताच्या सौम्यतेनें व नम्रतेनें तुम्हांला विनंति करितों; २ माझें मागणें असें आहे: कित्येक लोक आम्हीं देहस्वभावानें चालणारे आहों असें समजतात; असे लोक माझ्यापुढें आल्या-

र त्यांना कडकपणें बोलावेंसें मला वाटेल, तसें बोलण्याचें
ला भाग पडूं नये. ३ आमची वस्ती देहांत असूनहि
आम्ही देहस्वभावानें युद्ध करीत नाहीं. ४ आमच्या
द्धाचीं शस्त्रें दैहिक नाहींत, तर तटबंदी जमीनदोस्त
रण्यास तीं देवाच्या दृष्टीनें समर्थ आहेत; ५ तर्कवितर्क
देवज्ञानाविरुद्ध उंच उभारलेलें असें सर्व कांहीं पाडून
ाकून प्रत्येक कल्पना ख्रिस्ताधीन व्हावी म्हणून आम्ही
ी बंदिवान करून नेतों. ६ आणि तुमचें आज्ञापालन
र्णपणें झालें म्हणजे सर्व आज्ञाभंगाबद्दल दंड करावयास
आम्ही सिद्ध आहों. ७ डोळ्यानें दिसतें तेंच तुम्ही
ाहतां. मी ख्रिस्ताचा आहें असा जर कोणाला स्वतःविषयीं
रवसा आहे तर त्यानें पुनः आम्हांविषयीं आपणाबरोबर
ेचार करावा; तो असा कीं जसा मी ख्रिस्ताचा आहें तसे
ाहि ख्रिस्ताचे आहेत. ८ तो आमचा अधिकार प्रभूनें
ुमच्या नाशासाठीं नव्हे तर वृद्धीसाठीं आम्हांस दिला,
याविषयीं जरी मीं कांहींशी विशेष प्रतिष्ठा मिरविली तरी
ी लाजणार नाहीं; ९ असें कीं, मी तुम्हांस केवळ पत्रांनीं
भय घालणारा आहें असा भास होऊं नये. १० ते
हणतात, त्याचीं पत्रें वजनदार व जोरदार आहेत; परंतु
त्याचें स्वरूप पाहूं गेल्यास तें दुर्बळ व त्याचें भाषण तुच्छ-
वत् आहे. ११ असें म्हणणाऱ्यानें हें लक्षांत ठेवावें कीं
आम्ही दूर असतां जसें पत्रद्वारा, तसेंच आम्ही जवळ
असतां कृतिद्वाराहि वागलों आहों. १२ जे कित्येक स्वतःची
प्रशंसा करितात त्यांच्याबरोबर आपली गणना करण्याचें
अगर तुलना करण्याचें धाडस आम्ही करीत नाहीं; ते तर
स्वतःच स्वतःचें मोजमाप करितात, व स्वतःची स्वतःबरोबर
तुलना करितात; यामध्यें समंजसपणा नाहीं. १३ आम्ही
मर्यादा सोडून प्रतिष्ठा मिरविणार नाहीं, तर देवानें घालून
दिलेल्या मर्यादेप्रमाणें प्रतिष्ठा मिरवितों; ती मर्यादा तुम्हांपर्यंत
येऊन पोहंचली आहे. १४ तुम्हांपर्यंत न पोहंचावें अशी
आम्ही स्वतःची ओढाताण करीत नाहीं; कारण ख्रिस्ताच्या
सुवार्तेच्या द्वारा आम्ही तुम्हांपर्यंत पोहंचलोंच आहों; १५
आम्ही मर्यादा सोडून दुसऱ्यांच्या श्रमांसंबंधानें अभिमान
बाळगीत नाहीं; तर आम्हांस अशी आशा आहे कीं,
तुमचा विश्वास वाढून आम्हांस आमच्या मर्यादेच्या कक्षेंत
तुमच्या ठायीं विपुल विस्तार मिळेल, १६ असा कीं
तुमच्या पलीकडल्या प्रांतांत आम्हीं सुवार्ता सांगावी, दुस-
ऱ्याच्या मर्यादकक्षेंतील आयत्या गोष्टींचीं प्रतिष्ठा मिरवूं
नये. १७ प्रतिष्ठा मिरविणारा प्रभूची प्रतिष्ठा मिरवो. १८
स्वतःची वाखाणणूक करणारा पसंत ठरत नाहीं, तर ज्याची
वाखाणणूक प्रभु करतो तोच ठरतो.

### प्रेषित म्हणून त्याचा हक्क

१ माझें थोडेंसें मूर्खपण तुम्हीं सहन करावें;
**११** आणि तें तुम्ही करीतच आहां. २ मला ईश्वरी
आस्थेप्रमाणें तुम्हांविषयीं आस्था वाटते; कारण
मीं एका पतीबरोबर तुमची योजना केली आहे, यासाठीं
कीं तुम्हांला शुद्ध कुमारी असें ख्रिस्ताला सादर करून द्यावें.
३ तरी सापानें आपल्या कपटानें हव्वेला ठकविलें तसें
तुमचीं मनें कशानें तरी बिघडून तीं ख्रिस्ताकडील सरळपण
व शुद्धता यांपासून भ्रष्ट होतील असें मला भय आहे. ४
कारण जर कोणी येऊन ज्याला आम्हीं गाजविलें नाहीं
अशा अन्य येशूची घोषणा करितो, किंवा तुम्हांस मिळाला
नाहीं असा दुसरा आत्मा तुम्ही घेतां अथवा तुम्हीं स्वीका-
रिली नाहीं अशी दुसरी सुवार्ता स्वीकारितां तर त्यांत
तुमची सहनशीलता किती तरी आहे. ५ अतिश्रेष्ठ अशा
प्रेषितांपेक्षां मी यत्किंचित्हि उणा नाहीं असें मी मानितों.
६ जरी भाषण करण्यांत अशिक्षित तरी ज्ञानांत तसा नाहीं;
हें आम्हीं तुमच्यासंबंधानें सर्व लोकांत व सर्व प्रकारें प्रकट
केलें. ७ तुम्हीं उंच व्हावें म्हणून मीं आपणाला लीन
करून देवाची सुवार्ता फुकटवारी तुम्हांस सांगितली, हें मीं
पाप केलें काय? ८ मीं तुमची सेवा करावी म्हणून दुसऱ्या
मंडळ्यांपासून वेतन घेऊन त्यांस लुबाडिलें; ९ आणि
तुम्हांजवळ असतां मला उणें पडलें तेव्हांहि मीं कोणावर
भार घातला नाहीं; कारण मासेदोनियाहून आलेल्या बंधूंनीं
मला भासलेली वाण भरून काढिली; आणि कोणत्याहि
प्रकारें तुम्हांवर माझा भार पडूं नये म्हणून मी जपलों व
जपेनहि. १० ख्रिस्ताचें सत्य माझ्या ठायीं आहे, त्यावरून
सांगतों कीं माझ्या ह्या अभिमानास अखया प्रांतांत प्रति-
बंध होणार नाहीं. ११ मी कां बरें जपेन? मी तुम्हांवर
प्रीति करीत नाहीं म्हणून काय? देवाला ठाऊक आहे.

१२ जें मी करितों तें करीत राहीन; यासाठीं कीं जे निमित्त
पाहतात त्यांचें निमित्त मीं नाहींसें करावें, म्हणजे ज्याविषयीं
ते आढ्यता बाळगितात, त्याविषयीं त्यांनीं आम्हांसारिखेंच
आढळून यावें. १३ अशीं माणसें हीं खोटे प्रेषित, कपटी
कामदार, ख्रिस्ताच्या प्रेषितांचें रूप धरणारीं अशीं आहेत.
१४ ह्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. सैतानहि
स्वतः तेजोमय देवदूताचें रूप धरितो. १५ यास्तव त्याच्या
सेवकांनींहि नीतिवानाच्या सेवकांचें रूप धारण केल्यास
त्यामध्यें मोठीशी गोष्ट नाहीं; त्यांचा शेवट त्यांच्या कर्मा-
प्रमाणें होईल.

## पौल व त्याचे विरोधी यांजमधील तुलना

१६ मी पुनः म्हणतों, कोणीं मला मूर्ख समजूं नये; जर
तुम्ही तसें समजतां तर जसा मूर्खाचा तसा माझा स्वीकार
करा, म्हणजे मीहि थोडीशी तरी आढ्यता बाळगीन. १७
आढ्यतेच्या या भरवशानें जें मी बोलतों तें प्रभूला अनुस-
रून नव्हे, तर मूर्खपणानें बोलल्याप्रमाणें बोलतों. १८
देहस्वभावाप्रमाणें पुष्कळ लोक आढ्यता धरितात म्हणून
मीहि धरणार. १९ तुम्ही शहाणे आहां म्हणून आनंदानें
मूर्खांचें सहन करितां. २० कोणीं तुम्हांस दासपणांत घात-
ल्यास, तुम्हांस खाऊन टाकिल्यास, तुम्हांस धरिल्यास,
स्वतःला उंच केल्यास, कोणी तुमच्या तोंडांत मारिल्यास,
तें सगळें तुम्ही सहन करतां.

## पौलानें सोसलेलीं संकटें व अडचणी

२१ माझी दुर्बळता जमेस धरून हें मी स्वतःला
हिणवून बोलतों; तरी ज्या कशांत कोणी धीट असेल,
त्यांत मीहि धीट आहें ( हें मी मूर्खपणानें बोलतों ).
२२ ते इब्री आहेत काय ? मीहि आहें. ते इस्राएली
आहेत काय ? मीहि आहें. ते अब्राहामाचें संतान आहेत
काय ? मीहि आहें. २३ ते ख्रिस्ताचे सेवक आहेत काय ?
मी अधिक आहें ( हें मी वेड्यासारखें बोलतों ); श्रम
करण्यांत, बंदिवास सोसण्यांत; बेसुमार फटके खाल्ल्यामुळें
व पुष्कळ वेळां मरणसंकट सोसिल्यामुळें; मी अधिक आहें.
२४ पांच वेळां मीं यहूद्यांच्या हातून एकुणचाळीस फटके
खाल्ले. २५ तीन वेळां छड्यांचा मार खाल्ला; एकदा मला
दगडमार झाला; तीन वेळां माझें गलबत फुटलें व
समुद्रांत मीं अहोरात्र घालविली; २६ मीं किती तरी प्रवास
केला; नद्यांवरचीं संकटें, लुटारूंचीं संकटें, स्वजातीची
संकटें, विदेशी लोकांचीं संकटें, नगरांतील संकटें, रानांतील
संकटें, समुद्रांतील संकटें, खोट्या बंधूंचीं संकटें; २७ श्रम
व कष्ट, किती तरी वेळां केलेलीं जागरणें, भूकतहानेचा
मारा, पुष्कळ वेळां काढिलेले उपास, थंडी व उघडावा-
गडेपणा, या सर्वांमुळें मी अधिक आहें. २८ शिवाय ह्या
व अशा इतर गोष्टींखेरीज माझा रोजचा रगडा, म्हणजे सर्व
मंडळ्यांची चिंता, ही आहे. २९ कोण अशक्त झाला
असतां मी अशक्त होत नाहीं ? कोण अडखळविला गेला
असतां मला संताप येत नाहीं ? ३० मला आढ्यता
बाळगणें भाग पडलें तर मी आपल्या अशक्तपणाच्या
गोष्टींची आढ्यता बाळगीन. ३१ देव, आपल्या प्रभु येशूचा
पिता, जो युगानुयुग धन्यवादित आहे त्याला ठाऊक आहे
कीं मी खोटें बोलत नाहीं. ३२ दिमिष्कांत अरीतास
राजाचा देशाधिकारी यानें मला धरण्याकरितां दिमिष्क-
करांच्या नगरावर पहारा ठेविला होता. ३३ तरी मला
पाटींत बसवून गांवकुसाच्या खिडकींतून खालीं सोडिलें,
आणि त्याच्या हातांतून मी निभावलों.

## उदात्त आध्यात्मिक साक्षात्कार व दैहिक अशक्तता

१२ १ आढ्यता बाळगण्यापासून कांहीं फायदा
नाहीं, तरी तसें करणें मला भाग पडतें; मी प्रभूचे
दृष्टांत व प्रकटीकरणें हीं आतां घेतों. २ ख्रिस्तामधील
एक मनुष्य मला माहीत आहे, त्याला चवदा वर्षांमागें
तिसऱ्या स्वर्गापर्यंत उचलून नेण्यांत आलें; ( त्याला सदेह
नेण्यांत आलें अगर विदेह नेण्यांत आलें हें मला ठाऊक
नाहीं; देवाला ठाऊक आहे; ) ३ त्याच मनुष्याविषयीं मला
माहीत आहे कीं त्या मनुष्याला (सदेह किंवा विदेह हें मला
ठाऊक नाहीं; देवाला ठाऊक आहे; ) ४ सुखलोकांत
उचलून नेण्यांत आलें, आणि मानवानें बोलावयास योग्य
नाहींत अशा अनिर्वाच्य गोष्टी त्यानें ऐकल्या. ५ अशा
मनुष्याविषयीं मी आढ्यता बाळगणार; मी स्वतःविषयीं
नाहीं, तर केवळ आपल्या दुर्बळतेची आढ्यता बाळगीन.
६ मीं आपली आढ्यता बाळगण्याची इच्छा धरिली तरी

मी मूर्ख ठरणार नाहीं; मी खरेंच बोलेन; तथापि असें करणें मी राहूं देतों; कारण मी जो आहें म्हणून लोकांना दिसतों, किंवा मजपासून लोकांच्या जें कानीं पडतें त्यापलीकडे मला कोणीं मानूं नये. ७ प्रकटीकरणांच्या अतिशयामुळें मीं चढून जाऊं नये म्हणून माझ्या शरीरांत एक कांटा, मला बुकी मारण्याकरितां सैतानाचा एक दूत, ठेवण्यांत आला आहे; मीं चढून जाऊं नये म्हणून तो ठेवण्यांत आला आहे. ८ ह्या मजपासून दूर व्हावा अशी मीं प्रभूजवळ तीनदा विनंति केली; ९ परंतु त्यानें मला म्हटलें आहे, माझी कृपा तुला पुरे आहे; कारण माझी शक्ति अशक्तपणांत पूर्णतेस येते. तर ख्रिस्ताच्या शक्तीचा माझ्या ठायीं वास व्हावा म्हणून मी विशेषेंकरून आपल्या अशक्तपणाची आढ्यता फार आनंदानें बाळगीन. १० ख्रिस्तासाठीं दुर्बळता, अपमान, अडचणी, पाठलाग, संकटें सोसणें यांत मी संतुष्ट आहें; कारण मी अशक्त आहें तेव्हां मी सशक्त आहें.

### आढ्यतेनें कां लिहिलें ह्याविषयीं

११ मी मूर्ख बनलों; असें बनण्यास तुम्हीं मला भाग पाडिलें; माझी वाखाणणूक तुम्हीं करावयाची होती; कारण जरी मी कांहीं नाहीं तरी ह्या अतिश्रेष्ठ प्रेषितांपेक्षां यत्किंचित्‌हि उणा नव्हतों. १२ चिन्हें, अद्भुतें व महत्कृत्यें यांच्या योगें तुम्हांमध्यें प्रेषितानें करावयाचीं चिन्हें पूर्ण धीरानें करून दाखविलीं होतीं. १३ मी स्वतः तुम्हांला भार झालों नाहीं, याखेरीज कोणत्या गोष्टींत इतर मंडळ्यांपेक्षां तुम्हांला उणें केलें? या माझ्या अपराधाची क्षमा करा.

१४ पाहा, तिसऱ्यानें तुम्हांकडे येण्यास मी तयार आहें; आणि मी तुम्हांला भार होणार नाहीं; मी तुमचें कांहीं मागत नाहीं, तर तुम्हीच स्वतः मला पाहिजे आहां; मुलांनीं आईबापांसाठीं नव्हे तर आईबापांनीं मुलांसाठीं संग्रह केला पाहिजे. १५ मी तुमच्या जिवांसाठीं फार आनंदानें खर्च करीन व मी स्वतः सर्वांशानें खर्चीं पडेन. मी तुम्हांवर अतिशयच प्रीति करितों म्हणून तुम्ही मजवर कमी प्रीति करितां काय? १६ असो, मीं तुम्हांवर भार घातला नाहीं; तरी मी धूर्त होतों म्हणून तुम्हांस कपटानें पकडिलें. १७ ज्यांस मीं तुम्हांकडे पाठविलें त्यांच्यांतील एकाच्या द्वारें तरी मीं तुम्हांपासून स्वार्थ साधिला काय? १८ मीं तीतास विनंति केली, व त्याजबरोबर एका बंधूला पाठविलें. तीतानें तुम्हांपासून स्वार्थ साधिला काय? आम्ही एकाच आत्म्यानें, सारख्याच पावलांनीं चाललों नाहीं काय?

१९ तुम्हांस आम्ही प्रत्युत्तर देत आहों असें इतका वेळ तुम्हांस वाटलें असेल. आम्ही देवासमक्ष ख्रिस्तामध्यें बोलत आहों. प्रिय बंधूंनो, तुमच्या वृद्धीसाठीं हें सर्व आहे, २० कारण मला भीति वाटते कीं मी आल्यावर, जशी माझी अपेक्षा आहे तसे कदाचित् तुम्ही मला दिसून येणार नाहीं, आणि तुमची अपेक्षा नाहीं तसा मी तुम्हांस दिसून येईन; कदाचित् भांडणें, ईर्ष्या, राग, तट, चहाड्या, कानगोष्टी, रुसवे, अव्यवस्था हीं मला आढळून येतील. २१ मी पुनः आल्यावर माझा देव मला तुम्हांपुढें खालीं पाहावयास लावील; आणि ज्यांनीं पूर्वीं पाप करून आपण आचरिलेल्या अशुद्धपणाचा, जारकर्माचा व कामातुरपणाचा पश्चात्ताप केला नाहीं, अशा पुष्कळ लोकांविषयीं मला शोक करावा लागेल.

### येत्या भेटीकरितां आत्मिक तयारी करण्यासंबंधीं केलेले इशारे

**१३** १ ही माझी तुम्हांकडे येण्याची तिसरी खेप. दोघां अगर तिघां साक्षीदारांच्या तोंडानें प्रत्येक गोष्ट ठरते. २ ज्यांनीं पूर्वीं पाप केलें त्यांस व दुसऱ्या सर्वांस मीं पूर्वीं सांगितलें होतें, व दुसऱ्यानें तुम्हांजवळ असतांना सांगितलें तेंच आतां दूर असतांनाहि अगोदर सांगतों कीं मी फिरून आलों तर गय करणार नाहीं; ३ ख्रिस्त माझ्याद्वारें बोलतो याचें प्रमाण तुम्हांला पाहिजे तें हेंच; तो तुम्हांसंबंधानें शक्तिहीन नाहीं, तर तुम्हांमध्यें शक्तिमान् आहे; ४ त्यास अशक्तपणांत वधस्तंभावर खिळण्यांत आलें तरी तो देवाच्या सामर्थ्यानें जीवंत झाला आहे. तसे आम्हीहि त्यामध्यें शक्तिहीन आहों, तरी देवाच्या सामर्थ्यानें त्याजबरोबर तुम्हांबाबत जीवंत असे राहूं. ५ तुम्ही विश्वासांत आहां किंवा नाहीं यांविषयीं आपली परीक्षा करा; आपली प्रतीति पाहा. येशू ख्रिस्त तुम्हांमध्यें आहे असें तुम्ही स्वतःसंबंधानें समजतां ना? नाहीं तर तुम्ही कसोटीस उतरलेले नाहीं.

६ कसोटीस न उतरलेले असे आम्ही नाहीं हें तुम्ही ओळखाल अशी माझी आशा आहे. ७ आम्ही देवाजवळ अशी प्रार्थना करितों कीं तुम्हीं कांहीं वाईट करूं नये; आम्ही कसोटीस उतरलेले दिसावें म्हणून नव्हे, तर आम्ही कसोटीस न उतरलेले असे असलों तरी तुम्हीं चांगलें करावें म्हणून. ८ कारण सत्याविरुद्ध आम्हांस कांहीं करितां येत नाहीं, तर सत्यासाठीं करितां येतें. ९ जेव्हां आम्ही अशक्त आहों व तुम्ही शक्तिमान् आहां तेव्हां आम्ही आनंद करितों; व याबद्दल प्रार्थनाहि करितों, अशी कीं तुमची पूर्णता व्हावी. १० यामुळें मी जवळ नसतां हें लिहितों, यासाठीं कीं प्रभूनें जो अधिकार उभारण्यासाठीं मला दिला, पाडण्यासाठीं नव्हे; त्या अधिकाराप्रमाणें जवळ आल्यावर मीं कडकपणा चालवूं नये.

### समाप्ति

११ बंधुजनहो, इतकेंच आतां म्हणतों, तुमचें कल्याण असो; तुम्ही पूर्ण व्हा; समाधान मिळवा; एकचित्त व्हा; शांतीनें राहा; म्हणजे प्रीतीचा व शांतीचा देव तुम्हांसह राहील. १२ पवित्र चुंबन घेऊन एकमेकांस सलाम करा.

१३ सर्व पवित्र जन तुम्हांस सलाम सांगतात.

१४ प्रभु येशू ख्रिस्ताची कृपा, देवाची प्रीति, आणि पवित्र आत्म्याची सहभागिता तुम्हां सर्वांसह असो.

---

# पौलाचें गलतीकरांस पत्र



### नमस्कार

१ १, २ गलतियाच्या मंडळ्यांस: मनुष्यांपासून नव्हे, मनुष्याच्या द्वारेंहि नव्हे, तर येशू ख्रिस्त व ज्यानें त्याला मेलेल्यांतून उठविलें तो देवपिता, यांच्या द्वारें झालेला प्रेषित पौल, त्या मजकडून व माझ्याबरोबरच्या सर्व बंधुजनांकडून: ३, ४ देवपिता, व आपल्या देवपित्याच्या इच्छेप्रमाणें आपल्यांला सांप्रतच्या दुष्ट युगापासून सोडवावें म्हणून ज्यानें तुमच्याआमच्या पापांबद्दल स्वतःला दिलें तो आपला प्रभु येशू ख्रिस्त, याजपासून तुम्हांस कृपा व शांति असो; ५ त्याला युगानुयुग गौरव असो. आमेन.

### गलतीकरांनीं पौलाची केलेली निराशा

६ मला आश्चर्य वाटतें कीं ज्यानें तुम्हांस ख्रिस्तकृपेच्या द्वारें पाचारण केलें त्याजपासून तुम्ही इतके लवकर अन्य सुवार्तेकडे वळूं लागलां आहां; ७ ती दुसरी नाहीं; तरी पण तुम्हांस घोटाळ्यांत पाडणारे व ख्रिस्ताची सुवार्ता विपरीत करूं पाहणारे असे कित्येक आहेत. ८ जी सुवार्ता आम्हीं तुम्हांस सांगितली तिच्याहून निराळी सुवार्ता आम्ही सांगूं, किंवा स्वर्गांतून देवदूत येऊन सांगो, तरी तो उत्सृष्ट असो. ९ आम्हीं अगोदर सांगितलें तसें मी आतांहि पुनः सांगतों, कीं जी तुम्हीं स्वीकारिली तिच्याहून निराळी सुवार्ता कोणीं तुम्हांस सांगितल्यास तो उत्सृष्ट असो. १० मी आतां मनुष्यांची अगर देवाची मनधरणी करावयास पाहतों काय? मी मनुष्यांस संतुष्ट करावयास पाहतों काय? मीं अजून मनुष्यांस संतुष्ट करावयास पाहिलें असतें तर मी ख्रिस्ताचा दास नसतों.

### मनुष्यांपासून नव्हे तर ख्रिस्तापासून आपणास शुभवृत्त प्राप्त झालें आहे असें पौल सांगतो

११ बंधुजनहो, मी तुम्हांस कळवितों कीं मीं सांगितलेली सुवार्ता मनुष्याच्या व्यवहाराप्रमाणें नव्हे. १२ कारण ती मला मनुष्यापासून प्राप्त झाली नाहीं, आणि ती मला कोणीं शिकविलीहि नाहीं; तर येशू ख्रिस्ताच्या प्रकटीकरणानें ती मला प्राप्त झाली. १३ यहूदी धर्मांतल्या माझ्या पूर्वीच्या वर्तणुकीविषयीं तुम्हीं ऐकलें आहे कीं मी देवाच्या

मंडळीचा पराकाष्ठेचा छळ करीत असें व तिचा नाश
करीत असें; १४ आणि माझ्या पूर्वजांच्या संप्रदायांविषयीं
मी विशेष आवेशी असल्यामुळें स्वजातींतील माझ्या
वयाच्या पुष्कळ लोकांपेक्षां यहूदी धर्मांत मी पुढें गेलों
होतों. १५,१६ तरी ज्या देवानें मला माझ्या मातेच्या
उदरांतून जन्मल्यापासून वेगळें केलें व आपल्या कृपेनें
बोलाविलें त्याला, मीं विदेशी लोकांमध्यें त्याच्या सुवार्तेची
घोषणा करावी म्हणून आपल्या पुत्राला माझ्या ठायीं प्रकट
करावें हें जेव्हां बरें वाटलें, तेव्हांच [1]मानवांना न विचा-
रितां, १७ आणि माझ्यापूर्वी झालेल्या प्रेषितांकडे यरुश-
लेमास वर न जातां, मी अरबस्तानांत निघून गेलों; व
दिमिष्कास फिरून परत आलों.

१८ मग तीन वर्षांनंतर केफाला भेटावयास यरुशले-
मास वर गेलों; व त्याच्याजवळ पंधरा दिवस राहिलों; १९
परंतु प्रभूचा बंधु याकोब याच्यावांचून प्रेषितांतील दुसरा
कोणी माझ्या दृष्टीस पडला नाहीं. २० तर पाहा, जें मी
तुम्हांस लिहितों तें खोटें लिहीत नाहीं; हें मी देवासमक्ष
सांगतों. २१ मग सूरिया व किलिकिया या प्रांतांत मी
आलों. २२ तेव्हां ख्रिस्तामध्यें असणाऱ्या यहूदीयांतील
मंडळ्यांस माझी तोंडओळख नव्हती; २३ त्यांनीं एवढें
मात्र ऐकलें होतें कीं पूर्वी आपला छळ करणारा हा अगो-
दर ज्या विश्वासाचा नाश करीत होता त्याची तो आतां
घोषणा करीत आहे; २४ तेव्हां त्यांनीं मजवरून देवाचें
गौरव केलें.

## पौलाच्या कामगिरीचा अर्थ यरुशलेम-करांच्या ध्यानांत येतो

२ १ नंतर चवदा वर्षांनीं मी बर्णबासह तीतालाहि
बरोबर घेऊन यरुशलेमास पुनः वर गेलों, तें मला
प्रकटीकरण झाल्याप्रमाणें गेलों; २ जी सुवार्ता मी
विदेशी लोकांत गाजवीत असतों ती मीं त्यांस निवेदन
केली, परंतु जे प्रतिष्ठित होते त्यांस एकांतीं केली; नाहीं
तर मी व्यर्थ धावतों किंवा धावलों असें झालें असतें. ३
तथापि माझ्याबरोबरचा तीत हा हेल्लेणी असतांहि त्याला
देखील सुंता करवून घेणें भाग पडलें नाहीं. ४ या गोष्टीला,
चोरून आंत आणलेले खोटे बंधु कारण झाले; ते आम्हांस
दासपणांत घालण्याकरितां ख्रिस्त येशूमध्यें जी आमची
मोकळीक ती हेरावी म्हणून चोरून आंत आले होते;
५ त्यांस आम्ही घटकाभरहि वश होऊन मान्य
झालों नाहीं, यासाठीं कीं सुवार्तेचें सत्य तुम्हांजवळ राहावें.
६ जे कोणी प्रतिष्ठित असे मानिले जात होते (ते कसेहि
असले तरी त्यांचें मला कांहीं नाहीं, देव मनुष्यांच्या
तोंडाकडे पाहत नाहीं), असे जे प्रतिष्ठित होते त्यांनीं
माझ्या सुवार्तेंत कांहीं भर घातली नाहीं; ७ तर उलट,
जसें सुंती लोकांस सुवार्ता सांगण्याचें काम पेत्राला सोपलें
आहे तसें बेसुंती लोकांस सांगण्याचें काम मला
सोपलें आहे असें पाहून, ८ (कां तर ज्यानें पेत्राला
सुंती लोकांत प्रेषितपणा चालवावयास शक्ति पुरविली
त्यानें मलाहि विदेशी लोकांत शक्ति पुरविली;) ९ आणि
मला दिलेलें कृपादान ओळखून याकोब, केफा व योहान
हे जे आधारस्तंभ असे मानिले आहेत, त्यांनीं मला व
बर्णबाला, आपण देवाच्या कार्यांत सहभागी आहों हें
दर्शविण्याकरितां उजव्या हातांनीं हस्तांदोलन केलें; यासाठीं
कीं आम्हीं विदेश्यांकडे व त्यांनीं सुंती लोकांकडे जावें;
१० तरी आम्हीं गरिबांची आठवण करावी असें ठरलें;
आणि तेंच करावयाला मी स्वतः उत्कंठित होतों.

## पेत्राचा निषेध

११ पुढें केफा अंत्युखियास आला तेव्हां तो दोषी
ठरल्यामुळें मी त्याला तोंडोतोंड आडवा आलों; १२ कारण
याकोबापासून कित्येक जण येण्यापूर्वी तो विदेशी
लोकांच्या पंक्तीस जेवीत असे; आणि ते आल्यावर तो
सुंती लोकांस भिऊन माघारे घेऊन वेगळा राहिला. १३
त्याच्याबरोबर बाकीच्या यहूद्यांनीहि ढोंग केलें; तें असें
कीं बर्णबाहि त्यांच्या ढोंगानें ओढला गेला; १४ परंतु
सुवार्तेच्या सत्याप्रमाणें ते नीट चालत नाहींत, असें मीं
पाहिलें तेव्हां सर्वांसमक्ष मीं केफाला म्हटलें, तूं यहूदी
असतां विदेशी लोकांसारिखा वागतोस, यहूद्यासारिखा
वागत नाहींस, तर विदेशी लोकांनीं यहूद्यांसारिखें वागावें
म्हणून तूं त्यांजवर जुलूम करितोस हें कसें?

१ **मुळांत :** मांस व रक्त

## नियमशास्त्राला आलेलें अपेश

१५ आम्ही जातीचे यहूदी आहों, पापिष्ट विदेशी लोकांतले नाहीं; १६ तरी मनुष्य नियमशास्त्रांतील कर्मांनीं नीतिमान् ठरत नाहीं, तर येशू ख्रिस्तावरील विश्वासाच्या द्वारें ठरतो, अशा समजुतीनें आम्हींहि ख्रिस्त येशूवर विश्वास ठेविला; यासाठीं कीं आम्हीं ख्रिस्तावरील विश्वासानें नीतिमान् ठरावें, नियमशास्त्रांतील कर्मांनीं ठरूं नये; कारण नियमशास्त्रांतील कर्मांनीं 'मनुष्यजातीपैकीं कोणीहि नीतिमान् ठरावयाचा नाहीं.' १७ ख्रिस्तामध्यें नीतिमान् ठरण्यास पहात असतां आपणहि पापी दिसून आलों तर ख्रिस्त पापाचा पुरस्कर्ता आहे काय ? असें अगदीं नाहीं. १८ कारण जें मीं पाडून टाकिलें तें जर फिरून बांधितों तर मी उल्लंघणारा आहें असें सिद्ध करितों. १९ मी नियमशास्त्राच्या द्वारें नियमशास्त्राला मेलों, यासाठीं कीं मीं देवाकरितां जगावें. २० मी ख्रिस्ताबरोबर वधस्तंभाला खिळिलेला आहें; आणि मीं जगतों असें नाहीं, तर ख्रिस्त माझ्याठायीं जगतो; आणि आतां देहामध्यें जें माझें जीवित आहे तें विश्वासानें आहे; ज्या देवाच्या पुत्रानें मजवर प्रीति केली व स्वतःला मजकरितां दिलें त्याजवरील विश्वासानें तें आहे. २१ मी देवाची कृपा व्यर्थ करीत नाहीं, कारण जर नीतिमत्त्व नियमशास्त्रानें आहे तर ख्रिस्ताचें मरण निरर्थक झालें.

## मनुष्याचा स्वीकार देव श्रद्धेवर करील, नियमशास्त्रावर नाहीं

**३** १ अहो निर्बुद्धि गलतीकरांनो, वधस्तंभावर खिळिलेल्या येशू ख्रिस्ताला ज्या तुमच्या डोळ्यांपुढें वर्णन करून ठेविलें होतें त्या तुम्हांस कोणीं भुरळ घातली आहे ? २ तुम्हांला नियमशास्त्रांतील कर्मांनीं आत्मा मिळाला, किंवा विश्वासाच्या वार्तेनें मिळाला, इतकेंच तुम्हांपासून समजून घ्यावयाचें आहे. ३ तुम्ही इतके निर्बुद्धि आहां काय ? तुम्ही आत्म्यानें प्रारंभ केल्यावर आतां देहानें पूर्ण होतां काय ? ४ तुम्हीं इतकीं दुःखें सोशिलीं तीं व्यर्थ काय ? ह्याला व्यर्थ म्हणावें कसें ? ५ जो तुम्हांस आत्मा पुरवितो व तुम्हांमध्यें अद्भुतें करितो, तो नियमशास्त्रांतील कर्मांनीं किंवा विश्वासाच्या वार्तेनें करितो ? ६ अब्राहामाची गोष्ट घ्या; त्यानें 'देवावर विश्वास ठेविला आणि तें त्याला नीतिमत्त्व असें मोजण्यांत आलें.' ७ यावरून तुम्ही समजून घ्या कीं जे विश्वासाचे तेच अब्राहामाचे पुत्र आहेत. ८ देव विदेशी लोकांस विश्वासानें नीतिमान् ठरविणार, ह्या पूर्वज्ञानामुळें धर्मशास्त्रानें अब्राहामाला पूर्वींच ही सुवार्ता सांगितली; ती अशी कीं तुझ्यांतून सर्व राष्ट्रांना आशीर्वाद मिळेल; ९ म्हणून जे विश्वासाचे आहेत त्यांना विश्वासू अब्राहामासहित आशीर्वाद मिळतो. १० नियमशास्त्रांतील कर्में करणारे जितके आहेत तितके सर्व शापाधीन आहेत; असें लिहिलें आहे कीं नियमशास्त्राच्या पुस्तकांत जें लिहिलेलें आहे तें सर्व आचरण्यास जो कोणी नेट धरून राहत नाहीं तो शापित आहे. ११ नियमशास्त्राच्या योगें देवापुढें कोणी नीतिमान् ठरत नाहीं हें उघड आहे; कारण 'नीतिमान् विश्वासानें वांचेल;' १२ नियमशास्त्र विश्वासाचें नव्हे; परंतु 'जो त्यांतील कर्में आचरितो तो त्यांच्या योगें वांचेल.' १३ ख्रिस्तानें आपणांकरितां शापग्रस्त होऊन आपणांला नियमशास्त्राच्या शापापासून खंडणी देऊन सोडविलें; 'जो कोणी झाडावर टांगलेला आहे तो शापित आहे' असा शास्त्रलेख आहे; १४ ह्यांत उद्देश हा कीं अब्राहामाला दिलेला आशीर्वाद ख्रिस्त येशूमध्यें विदेशी लोकांना मिळावा; म्हणजे आपणांला विश्वासाच्या द्वारें आत्म्याचें वचन मिळावें.

१५ बंधुजनहो, मी व्यावहारिक दृष्टीनें बोलतों; मनुष्यानें देखील कायम केलेला करार कोणी रद्द करीत नाहीं किंवा वाढवीत नाहीं. १६ अब्राहामाला व त्याच्या संतानाला तीं वचनें सांगितलीं होतीं. 'संतानांला' असें पुष्कळ जणांसंबंधानें म्हटलेलें नाहीं; तर 'तुझ्या संतानाला' असें एकाविषयीं म्हटलें आहे, आणि तो एक ख्रिस्त आहे. १७ मी असें म्हणतों कीं, चारशें तीस वर्षांनंतर झालेलें नियमशास्त्र देवानें अगाऊच कायम केलेल्या कराराला रद्द करून वचन व्यर्थ करीत नाहीं. १८ कारण वतन जर नियमशास्त्रानें प्राप्त होतें, तर वचनानें होत नाहीं; पण देवानें तें अब्राहामाला वचनद्वारा दिलें.

## नियमशास्त्राचा हेतु

१९ तर मग नियमशास्त्राचें काय ? ज्या संतानाला वचन दिलें तें येईपर्यंत नियमशास्त्र हें उल्लंघनें ठरविण्याकरितां लावून दिलें होतें; तें मध्यस्थाच्या हस्तें देवदूतांच्या द्वारें नेमून दिलें होतें. २० मध्यस्थ हा एकाचा नसतो; आणि देव तर एक आहे. २१ तर मग नियमशास्त्र देवाच्या वचनांविरुद्ध आहे काय ? असें न होवो. कारण जीवन देण्यास समर्थ असें नियमशास्त्र दिलें असतें तर नीतिमत्त्व खरोखरच नियमशास्त्रानें झालें असतें. २२ तरी धर्मशास्त्रानें सर्वांस पापाच्या अधीन करून त्याच्या कोंडींत टाकलें. आहे; ह्यांत उद्देश हा आहे कीं जे विश्वास ठेवितात त्यांस येशू ख्रिस्तावरच्या विश्वासानें जें वचन तें मिळावें.

२३ ह्या विश्वासाच्या आगमनापूर्वी जो विश्वास प्रकट होणार होता, त्यासाठीं आपल्याला कोंडींत टाकिलें होतें, आणि आपल्याला नियमशास्त्राधीन असें रखवालींत ठेविलें होतें. २४ आपण विश्वासानें नीतिमान् ठरावें म्हणून नियमशास्त्र आपल्याला ख्रिस्ताकडे पोहंचविणारें बालरक्षक होतें.

## श्रद्धेचा परिणाम

२५ आतां विश्वासाचें आगमन झालें आहे म्हणून आपण यापुढें बालरक्षकाधीन नाहीं. २६ ख्रिस्त येशूवरील विश्वासाच्या द्वारें तुम्ही सर्व देवाचे पुत्र आहां. २७ तुम्हांमधील जितक्या जणांचा ख्रिस्तामध्यें बाप्तिस्मा झाला आहे तितक्यांनीं ख्रिस्ताला परिधान केलें आहे; २८ अशा तुम्हांमध्यें यहूदी व हेल्लेणी, दास व स्वतंत्र, पुरुष व स्त्री, हा भेद नाहीं; कारण सर्व तुम्ही ख्रिस्त येशूमध्यें एक आहां; २९ आणि तुम्ही जर ख्रिस्ताचे आहां तर अब्रहामाचें संतान आणि वचनद्वारा वारीस आहां.

## ख्रिस्तश्रद्धेद्वारा देवपुत्रत्वाची प्राप्ति

४ १ आतां मी म्हणतों कीं वारीस जोंपर्यंत बाळ आहे तोंपर्यंत तो सर्वांचा धनी असूनहि त्याच्यामध्यें व दासामध्यें कांहीं भेद नाहीं; २ बापानें ठरविलेल्या मुदतीपर्यंत त्याला पालकांच्या व कारभाऱ्यांच्या स्वाधीन राहावयाचें असतें. ३ तसें आपणहि बाळ होतों तेव्हां जगांतील प्राथमिक शिक्षणाच्या दास्यांत होतों; ४ परंतु काळाची पूर्णता झाली तेव्हां देवानें आपल्या पुत्राला पाठविलें; तो स्त्रीपासून जन्मलेला, नियमशास्त्राधीन असा जन्मलेला होता. ५ ह्यांत उद्देश हा होता कीं जे नियमशास्त्राधीन होते त्यांस त्यानें खंडणी देऊन सोडवावें, आणि आपल्याला दत्तक पुत्राचा हक्क मिळावा. ६ तुम्ही पुत्र आहां, यास्तव देवानें अब्बा, बापा, अशी हाक मारणाऱ्या आपल्या पुत्राच्या आत्म्याला तुमच्याआमच्या अंतःकरणांत पाठविलें आहे. ७ यावरून तूं आतांपासून दास नाहींस तर पुत्र आहेस; आणि पुत्र आहेस तर देवद्वारें वारीसहि आहेस.

## ख्रिस्ताकडून मिळालेली स्वतंत्रता दवडूं नये

८ तथापि तुम्ही पूर्वी देवाला ओळखीत नव्हतां तेव्हां जे वस्तुतः देव नाहींत त्यांचे दास होतां; ९ पण आतां तुम्ही देवाला ओळखतां; वास्तविक पाहतां देवानें तुमची ओळख करून घेतली आहे; तर मग दुर्बळ व निःसत्व अशा प्राथमिक शिक्षणाकडे पुनः कसे वळतां ? त्याचे दास पुनः नव्यानें होण्याची इच्छा कशी करतां ? १० दिवस, महिने, सणाचे काळ व वर्षें हीं तुम्हीं पाळितां. ११ तुमच्यासंबंधानें केलेले माझे श्रम कदाचित् व्यर्थ झाले असतील, म्हणून मला तुमची काळजी वाटते.

१२ बंधुजनहो, मी तुम्हांस विनंति करितों, जसा मी आहें तसे तुम्ही व्हा, कारण जसे तुम्ही होतां तसा मीहि झालों होतों. तुम्हीं माझा कांहीं अन्याय केला नाहीं; १३ तुम्हांस ठाऊक आहे कीं पहिल्यानें तुम्हांस सुवार्ता सांगण्यांत आली ती माझ्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें सांगण्यांत आली; १४ आणि तुम्हांला तसदी होण्यासारखें माझ्या प्रकृतींत जें होतें त्याचा तुम्हीं धिक्कार अगर कंटाळा केला नाहीं; तर देवाच्या दूतासारिखा, ख्रिस्त येशूसारिखा, माझा स्वीकार केला. १५ तेव्हांची तुमची ती धन्यता कोठें ? मी तुम्हांविषयीं साक्ष देतों कीं साध्य असतें तर तुम्हीं आपले डोळे उपटून काढून मला दिले असते. १६ तर मग तुम्हांबरोबर खरें बोलतों म्हणून मी तुमचा वैरी झालों आहें काय ? १७ ते तुम्हांस मिळवून घेण्याची खटपट करितात पण ती शुद्ध हेतूनें नव्हे; तर तुम्हीं त्यांस मिळवून घेण्याची खटपट करावी म्हणून ते तुम्हांस वेगळे ठेवूं पाहतात. १८ तुमच्या-

संबंधानें योग्य बाबतींत सदासर्वदा खटपट करावी हें
चांगलें आहे, आणि हें मी तुम्हांजवळ आहें तेव्हांच
केवळ व्हावें असें नाहीं. १९ प्रिय मुलांनो, तुम्हांमध्यें
ख्रिस्ताचें स्वरूप उत्पन्न होईपर्यंत मला पुनः तुमच्यासंबं-
धानें प्रसूतीच्या वेदना आहेत. २० मी आतां तुम्हांजवळ
असावें व आपली वाणी बदलावी अशी माझी इच्छा आहे;
कारण तुम्हांविषयीं मी बुचकळ्यांत पडलों आहें.

२१ जे तुम्ही नियमशास्त्राधीन व्हावयास पाहतां ते
तुम्ही नियमशास्त्र ऐकत नाहीं काय, हें मला सांगा. २२
धर्मशास्त्रांत असें लिहिलें आहे कीं अब्राहामाला दोन पुत्र
होते, एक दासीपासून झालेला व एक स्वतंत्र स्त्रीपासून.
२३ तरी दासीपासून झालेला दैहिक रीतीनें आणि स्वतंत्र
स्त्रीपासून झालेला वचनद्वारें जन्मला. २४ ह्या गोष्टी
दृष्टांतरूप आहेत; त्या स्त्रिया म्हणजे दोन करार आहेत;
एक तर सीनाय डोंगरावरून केलेला; तो दासांस जन्म
देणारा, म्हणजे हागार आहे. २५ हागार अरबस्तानांतील
सीनाय डोंगर आहे, आणि ती हल्लींच्या यरुशलेमाच्या
जोडीची आहे; ती आपल्या मुलांबाळांसुद्धां दास्यांत
आहे. २६ वरील यरुशलेम स्वतंत्र आहे, ती आपली माता
आहे. २७ शास्त्रलेख असा आहे:

मूल होत नसलेल्या वंध्ये, आनंदित हो;
ज्या तुला प्रसूतिवेदना होत नाहींत
ती तूं आनंदानें जयघोष कर; आनंदाची आरोळी मार;
कारण जिला पति आहे तिच्या मुलांपेक्षां
सोडलेल्या स्त्रीचीं मुलें पुष्कळ आहेत.

२८ बंधुजनहो, इसहाकाप्रमाणें आपण वचनाची संतति
आहों.

## जुन्या करारांतलें एक उदाहरण

२९ त्या वेळेस देहरीत्या जन्मलेल्या इसमानें आध्या-
त्मिकरीत्या जन्मलेल्या इसमाचा छळ केला, तसा आतांहि
होत आहे. ३० पण धर्मशास्त्र काय म्हणतें? 'दासी व
तिचा पुत्र यांस बाहेर घालीव; कारण दासीचा पुत्र' स्वतंत्र
स्त्रीच्या 'पुत्राबरोबर वारीस होणारच नाहीं.' ३१ यास्तव
बंधुजनहो, आपण दासीची संतति नव्हों, तर स्वतंत्र
स्त्रीची आहों.

५ १ आपणांला स्वातंत्र्य असावें म्हणून ख्रिस्तानें
आपणांस स्वतंत्र केलें; यास्तव स्थिर राहा, दास्याच्या
जुवाखालीं पुनः सांपडूं नका.

## शुभवर्तमान व नियमशास्त्र यांतून कोणतें निवडणार ?

२ पाहा, मी पौल तुम्हांस सांगतों कीं जर तुम्ही सुंता
करून घेतां तर तुम्हांस ख्रिस्ताचा कांहीं उपयोग होणार
नाहीं. ३ सुंता करून घेणाऱ्या प्रत्येक मनुष्याला मी पुनः
निश्चितार्थानें सांगतों कीं तो सर्व नियमशास्त्र आचरावयास
बांधलेला आहे. ४ जे तुम्ही नियमशास्त्रानें नीतिमान
ठरणारे आहां त्या तुमचा ख्रिस्ताबरोबरचा संबंध नाहींसा
झाला आहे; तुम्ही कृपाभ्रष्ट झालां आहां. ५ आम्हीं
आत्म्याच्या द्वारा विश्वासानें नीतिमत्त्वाची आशा धरून
वाट पाहत आहों. ६ ख्रिस्त येशूमध्यें सुंता कांहीं कामाची
नाहीं व बेसुंताहि नाहीं; तर प्रीतीच्या द्वारें कार्य करणारा
जो विश्वास तो कामाचा आहे. ७ तुम्ही चांगले धावत
होतां; तर सत्याला मान्य होऊं नये असा तुम्हांस कोणीं
अडथळा केला? ८ ही मनोधारणा तुम्हांस ज्यानें पाचारण
केलें त्याची नाहीं. ९ थोडेंसें खमीर सगळ्या गोळ्याला
व्यापून टाकितें. १० मला प्रभूमध्यें तुमचा असा भरवसा
आहे कीं तुम्ही दुसरें मत धरणार नाहीं; तुम्हांस घोटाळ्यांत
पाडणारा कोणीहि असो, तो दंड भोगील. ११ बंधुजनहो,
मी अजून सुंतेचा उपदेश करीत आहें तर मग माझा छळ
कां होतो? अशानें वधस्तंभाचें अडखळण नाहींसें झालें
आहे. १२ तुमच्या ठायीं अस्थिरता उत्पन्न करणारे
स्वतःला छेदून घेतील तर बरें होईल.

## स्वातंत्र्याचें नियमन प्रेमाच्या द्वारें झालें पाहिजे

१३ बंधुजनहो, तुम्हांला स्वतंत्रतेकरितां पाचारण झालें;
तरी त्या स्वतंत्रतेनें देहवासनांना वाव मिळूं देऊं नका, तर
प्रीतीनें एकमेकांचे दास व्हा. १४ कारण 'जशी आपणावर
तशी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर,' हें एक वचन
पाळण्यांत सर्व नियमशास्त्र पाळण्यासारखें आहे; १५ परंतु
तुम्ही जर एकमेकांस चावतां व खाऊन टाकितां तर परस्प-
रांच्या हातून एकमेकांचा क्षय होऊं नये म्हणून जपा.

## पवित्र आत्म्याचें मार्गदर्शित्व

१६ आत्म्याच्या प्रेरणेनें चाला, म्हणजे तुम्ही देहवासना पूर्ण करणारच नाहीं असें मी सांगतों. १७ कारण देहवासना आत्म्याविरुद्ध असते, व आत्म्याची प्रेरणा देहाविरुद्ध असते; त्या परस्परविरुद्ध आहेत; यामुळें जें कांहीं तुम्ही करूं पाहतां तें तुमच्या हातून होत नाहीं. १८ तुम्ही आत्म्याच्या प्रेरणेनें चालविलेले आहां तर तुम्ही नियमशास्त्राधीन नाहीं. १९ देहाचीं कर्मे तर उघड आहेत; तीं हीं: जारकर्म, अशुद्धपणा, कामातुरपणा, २० मूर्तिपूजा, चेटकें, वैर, कलह, मत्सर, राग, तट, फुटी, पक्षभेद, २१ हेवा, दारूबाजी, रंगेलपणा आणि अशा इतर गोष्टी; यांविषयीं जें मीं पूर्वी तुम्हांस सांगून ठेविलें होतें तेंच आतां सांगून ठेवितों कीं अशीं कर्मे करणाऱ्यांना देवाच्या राज्याचें वतन मिळणार नाहीं. २२ आत्म्याच्या प्रभावानें होणारी फलप्राप्ति प्रीति, आनंद, शांति, सहनशीलता, ममता, चांगुलपणा, विश्वासूपणा, २३ सौम्यता. इंद्रियदमन ही आहे; अशांविरुद्ध नियमशास्त्र नाहीं. २४ जे ख्रिस्त येशूचे आहेत त्यांनीं दुर्वृत्ति व वासना यांसुद्धां देहाला वधस्तंभावर खिळिलें आहे.

२५ आपण जर आपला जीवनक्रम आत्म्याच्या प्रेरणेनें चालवीत आहों तर आपण आत्म्याच्या प्रेरणेनेंच वागणूक करावी. २६ आपण पोकळ अभिमानी होऊन एकमेकांस चिडवूं नये, व एकमेकांचा हेवा करूं नये.

## व्यवहारोपयोगी बोध

६ १ बंधुजनहो, कोणी मनुष्य एखाद्या अपराधांत सांपडला तरी जे तुम्ही आत्मा पावलेले आहां ते तुम्ही अशाला सौम्य भावानें ताळ्यावर आणा; तूंहि परीक्षेंत पडूं नये याविषयीं स्वतः संभाळ. २ एकमेकांचीं ओझीं वाहा, म्हणजे तुम्ही ख्रिस्ताचा नियम पूर्ण कराल. ३ कारण आपण कोणी नसतां कोणी आहों अशी कल्पना करणारा स्वतःला फसवितो. ४ तर प्रत्येकानें आपापल्या कामाची परीक्षा करावी म्हणजे त्याला दुसऱ्याच्या संबंधानें नव्हे, तर केवळ स्वतःसंबंधानें अभिमान बाळगण्यास जागा मिळेल. ५ कारण प्रत्येकानें आपापला भार वाहिला पाहिजे.

६ वचनाचें शिक्षण घेणारा व शिक्षण देणारा हे सर्व चांगल्या गोष्टींत एकमेकांचे भागीदार होवोत. ७ फसूं नका; देवाचा उपहास व्हावयाचा नाहीं; कारण मनुष्य जें कांहीं पेरितो त्याचेंच त्याला पीक मिळेल. ८ जो आपल्या देहासाठीं पेरितो त्याला देहापासून नाशाचें पीक मिळेल; आणि जो आत्म्यासाठीं पेरितो त्याला आत्म्यापासून सार्वकालिक जीवनाचें पीक मिळेल. ९ योग्य तें करावयाचा आपल्याला कधीं कंटाळा येऊं नये; आपण न खचलों तर यथाकाळीं आपल्या पदरीं पीक पडेल. १० तर मग आपणांला प्रसंग आहे त्याप्रमाणें आपण सर्वांचें व विशेषतः विश्वासबंधूंचें बरें करावें.

## समाप्ति

११ पाहा, मीं स्वहस्तें केवढ्या मोठ्या अक्षरांनीं तुम्हांस लिहिलें आहे. १२ दैहिक गोष्टींचा डौल मिरविण्यास जितके लोक पाहतात, तितके ख्रिस्ताच्या वधस्तंभामुळे स्वतःचा छळ होऊं नये म्हणूनच तुम्हांस सुंता करून घेण्यास लावितात; १३ कारण सुंता करून घेणारे स्वतःहि नियमशास्त्र पाळीत नाहींत; तर तुम्हांवर देहदृष्ट्या आढ्यता मिरविण्याकरितां तुमची सुंता व्हावी अशी इच्छा बाळगतात. १४ आपला प्रभु येशू ख्रिस्त याच्या वधस्तंभाच्या अभिमानाशिवाय कशाचाहि अभिमान बाळगणें माझ्या हातून न होवो; त्याच्याद्वारें जग मला व मी जगाला वधस्तंभावर खिळिलेला आहें. १५ सुंता ही कांहीं नाहीं, व बेसुंता हीहि कांहीं नाहीं, तर नवी उत्पत्ति हिचीच कायती योग्यता आहे. १६ जितके ह्या नियमानें वागतील तितक्यांवर व देवाच्या इस्राएलावर शांति व दया असो.

१७ यापुढें कोणी मला त्रास न देवो; कारण मी आपल्या शरीरावर येशूच्या खुणा धारण करून आहें.

१८ बंधुजनहो, आपला प्रभु येशू ख्रिस्त याची कृपा तुमच्या आत्म्यावर असो. आमेन.

# पौलाचें इफिसकरांस पत्र

## नमस्कार

१ इफिस एथील पवित्र जन व ख्रिस्त येशूम-
1 धील विश्वास ठेवणारे यांस देवाच्या इच्छेनें ख्रिस्त
येशूचा प्रेषित पौल याजकडून : २ देव आपला पिता
व प्रभु येशू ख्रिस्त याजपासून तुम्हांस कृपा व शांति असो.

## ईशस्मरण

३ आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताचा पिता जो देव तो
धन्यवादित असो; त्यानें स्वर्गांतील सर्व आध्यात्मिक वर
देऊन आपणांला ख्रिस्तामध्यें धन्य केलें आहे; ४ आपण
प्रेमामध्यें त्याच्या दृष्टीनें पवित्र व निर्दोष व्हावें, म्हणून
त्यानें सृष्टीच्या स्थापनेपूर्वी आपल्याला ख्रिस्तामध्यें निव-
डिलें; ५, ६ त्यानें त्या प्रियकराच्या द्वारें आपल्यावर जी
कृपा केली तिच्या महिम्याची स्तुति व्हावी म्हणून त्यानें
आपल्या मनाच्या संकल्पाप्रमाणें आपल्याला येशू ख्रिस्ताच्या
द्वारें स्वतःचे दत्तक होण्याकरितां अगाऊ नेमिलें; ७
त्याच्या कृपेच्या विपुलतेप्रमाणें त्या प्रियकरांत त्याच्या
रक्ताच्या द्वारें आपल्याला मुक्ति म्हणजे आपल्या अपरा-
धांची क्षमा मिळाली आहे; ८ त्यानें ही कृपा सर्व ज्ञान
व बुद्धि यांच्या द्वारा आपल्यावर विपुल केली आहे; ९
त्यानें स्वतःच्या इच्छेनुरूप व त्याच्या ठायीं पूर्वी केलेल्या
योजनेप्रमाणें स्वसंकल्पाचें गूज आपल्याला कळविलें; १०
ती योजना अशी कीं काळाच्या पूर्णतेची व्यवस्था लावि-
तांना आकाशांत व पृथ्वीवर जें आहे तें सर्व ख्रिस्तामध्यें
एकत्र करावें; ११ आपल्या मनाच्या संकल्पाप्रमाणें जो
अवघें चालवितो त्याच्या योजनेप्रमाणें पूर्वी नेमिलेले
जे आम्ही ते त्यामध्यें वतनहि झालों आहों; १२
यासाठीं कीं पूर्वीच ख्रिस्तावर आशा ठेवणारे जे
आम्ही त्या आम्हांवरून त्याच्या महिम्याची स्तुति
व्हावी; १३, १४ तुम्हीहि सत्याचें वचन म्हणजे
तुमच्या तारणाची सुवार्ता ऐकल्यानंतर, त्याजवर
विश्वास ठेविला, आणि निजजनांच्या मुक्तीसाठीं आपल्या
वतनाचा विसार असा जो देऊं केलेला पवित्र आत्मा याचा
शिक्का, देवाच्या महिम्याची स्तुति व्हावी म्हणून तुम्हांस
मिळाला.

## देवज्ञानाच्या प्राप्तीस्तव प्रार्थना

१५ यास्तव प्रभु येशूवर तुम्हांमध्यें जो विश्वास आहे,
आणि जें प्रेम तुम्ही सर्व पवित्र जनांसंबंधानें व्यक्त करितां
त्याविषयीं ऐकून, १६ तुम्हांसाठीं मी उपकार मानितां
राहत नाहीं; मी आपल्या प्रार्थनांत तुमची आठवण करून
असें मागतों कीं, १७ आपला प्रभु येशू ख्रिस्त याचा देव,
वैभवशाली पिता, यानें तुम्हांस आपल्या ओळखीसंबंधीं
ज्ञान व प्रकटीकरण यांचा आत्मा द्यावा; १८ असा कीं
तुमचे ज्ञानचक्षु प्रकाशित होऊन त्याच्या पाचारणापासून
होणारी आशा काय, पवित्र जनांमध्यें त्यानें दिलेल्या
वतनाच्या वैभवाची संपत्ति केवढी, १९ आणि जे आपण
विश्वास ठेवणारे त्या आपणांविषयींच्या त्याच्या सामर्थ्याचें
अपार महत्त्व तें काय हें तुम्हीं, त्याच्या बळाच्या परा-
क्रमाच्या कृतीवरून ओळखून घ्यावें.

## ख्रिस्ताचें पुनरुत्थान झाल्यानें दिसून आलेलें देवाचें सामर्थ्य

२० त्यानें तीच कृति ख्रिस्ताच्या ठायीं दाखवून त्याला
मेलेल्यांतून उठविलें; २१ आणि सर्व सत्ता, अधिकार,
सामर्थ्य, धनीपण, सांप्रत आणि भावी युगांतील कोणतेंहि
नांव घ्या, त्या सर्वांहून उंच करून स्वर्गलोकीं त्याला
आपल्या उजवीकडे बसविलें; २२ त्यानें सर्व कांहीं
त्याच्या पायांखालीं घातलें, आणि त्यानें सर्वांवर मस्तक
असें व्हावें म्हणून त्यास मंडळीला दिलें; २३ हीच त्याचें
शरीर; जो सर्वांनीं सर्व भरतो त्यानें ती भरलेली आहे.

## तारणप्राप्ति देवाच्या कृपेनें होते

१ तुम्ही आपले अपराध व आपलीं पातकें
2 यांमुळें मृत झालां असतां तुम्हांसहि त्यानें जीवंत
केलें २ त्यांत तुम्ही पूर्वी चालत असां. हें तुमचें

कृत्य जगाच्या रहाटीप्रमाणें अंतरिक्षाचा राज्याधिपति, म्हणजे आज्ञाभंजक लोकांत आतां कार्य करणाऱ्या आत्म्याचा अधिपति, त्याच्या वहिवाटीप्रमाणें असे. ३ त्या लोकांत आपण सर्व आपल्या दैहिक वासनांस अनुरूपसें मागें वागलों, आपल्या देहाच्या व मनाच्या इच्छांप्रमाणें करीत होतों व निसर्गतः इतरांप्रमाणें क्रोधाची प्रजा होतों;
४ तरी देव दयाघन आहे म्हणून आपण आपल्या अपराधामुळें मृत झालों असतांहि त्यानें आपल्यावरील स्वतःच्या परम प्रेमामुळें ५ ख्रिस्ताबरोबर आपणांला जीवंत केलें, (तुमचें तारण कृपेनें झालें आहे); ६ ख्रिस्त येशूमध्यें त्याच्यासह उठविलें आणि त्याच्यासह स्वर्गलोकीं बसविलें;
७ यासाठीं कीं ख्रिस्त येशूमध्यें त्याची आपल्यावर जी ममता तिच्या द्वारें येणाऱ्या युगांत त्यानें आपल्या कृपेची अपार संपत्ति दाखवावी; ८ तुमचें तारण कृपेनेंच विश्वासाच्या द्वारें झालें आहे, आणि हें तुमच्या हातून झालें नाहीं, तर हें देवाचें दान आहे; ९ कोणीं आढ्यता बाळगूं नये म्हणून कर्में केल्यानें हें झालें नाहीं. १० आपण चांगलीं कर्में करावीं म्हणून ख्रिस्त येशूमध्यें उत्पन्न केलेले असे आपण त्याच्या हातचें काम आहों; तीं कर्में आपण करावीं म्हणून देवानें तीं पूर्वी योजून ठेविलीं.

### यहूदी व यहूदीतर यांचें ख्रिस्ती मंडळींत ऐक्य झालेलें आहे

११ यास्तव पूर्वीची आठवण करा; तुम्ही देहानें विदेशी, आणि स्वतःला सुंती म्हणविणाऱ्या लोकांकडून बेसुंती असे म्हणविले जात होतां; त्यांची सुंता म्हणजे हातानें केलेली देहाची अशी असे; १२ ते तुम्ही त्या वेळेस ख्रिस्तविरहित, इस्राएलाच्या राष्ट्राबाहेरचे, वचनाच्या करारांस परके, आशाहीन व जगांत देवहीन असे होतां;
१३ परंतु जे तुम्ही पूर्वी दूर होतां ते तुम्ही आतां ख्रिस्त येशूमध्यें ख्रिस्ताच्या रक्तानें जवळ झालां आहां. १४
कारण तो आपला समेट असा आहे; त्यानें दोघांस एक केलें, आणि मधली आडभिंत पाडिली; १५ त्यानें आपल्या देहानें वैर नाहीसें केलें, हें वैर म्हणजे आज्ञाविधींचें नियमशास्त्र; यासाठीं कीं आपण समेट घडवून आणून आपल्या ठायीं दोघांचा एक नवा मनुष्य उत्पन्न करावा; १६ आणि त्यानें वधस्तंभावर वैरभाव जिवें मारून त्याच्या द्वारें देवाबरोबर त्यांचें एकशरीर करून दोघांचा समेट करावा म्हणून असें केलें; १७ त्यानें स्वतः येऊन जे तुम्ही दूर होतां त्या तुम्हांस व जे जवळ होते त्यांस शांतीची सुवार्ता सांगितली. १८ त्याच्या द्वारें एका आत्म्यांत आपणां उभयतांचा पित्याजवळ प्रवेश होतो.
१९ तर यावरून तुम्ही आतांपासून परके व परदेशीय नाहीं, तर पवित्र जनांचें एकराष्ट्र व देवाच्या घरचे आहां;
२० प्रेषित व संदेष्टे यांच्या पायावर तुम्ही रचिलेले आहां, व ख्रिस्त येशू हाच कोनशिला आहे; २१ त्याच्यामध्यें प्रत्येक इमारत जोडून रचिली असतां वाढत वाढत प्रभूच्या ठायीं पवित्र मंदिर होतें; २२ त्यांत तुम्हीहि आत्म्यानें देवाच्या वस्तीसाठीं एकत्र रचिलेले आहां.

### देवाच्या रहस्याचें प्रकटीकरण करण्याच्या कामगिरीवर पौलाची पाठवणी

३ १ याकरितां मी पौल तुम्हां विदेशी लोकांसाठीं ख्रिस्त येशूचा बंदिवान आहें. २ देवाची जी कृपा तुम्हांसाठीं मला प्राप्त झाली तिच्या व्यवस्थेविषयीं तुम्हीं ऐकलें असेलच; ३ म्हणजे प्रकटीकरणाच्या द्वारें जें गूज मला कळविलें गेलें, त्याविषयीं मीं थोडक्यांत वर लिहिलें आहे; ४ तें वाचून ख्रिस्ताच्या गुजाचें परिज्ञान मला झाल्याचें तुम्हांला समजेल; ५ हें जें गूज आतां त्याच्या पवित्र प्रेषितांस व संदेष्ट्यांस आत्म्यानें प्रकट झालें आहे, तें इतर पिढ्यांच्या मनुष्यसंतानांस कळविलें नव्हतें. ६ तें हें कीं विदेशी लोक ख्रिस्त येशूच्या ठायीं सुवार्तेच्या योगानें वतनबंधु, एकशरीर व वचनाचे सहभागी आहेत; ७ देवाचें जें कृपादान त्याच्या सामर्थ्याच्या करणीनें मला प्राप्त झालें तेणेंकरून मी त्या सुवार्तेचा सेवक झालों. ८ सर्व पवित्र जनांतील मी जो लहानाहून लहान, त्या मजवर ही कृपा अशी झाली कीं मीं ख्रिस्ताच्या अगाध संपत्तीची सुवार्ता विदेशी लोकांस सांगावी; ९ आणि ज्यानें सर्व उत्पन्न केलें त्या देवाच्या ठायीं जें गूज युगादिकालापासून गुप्त राहिलें आहे त्याची व्यवस्था काय, हें सर्वांस प्रकाशित करावें; १०, ११ यासाठीं कीं जो युगादिकालचा संकल्प

त्यानें आपल्या प्रभु ख्रिस्त येशूमध्यें केला त्याप्रमाणें देवाचें
बहुविध ज्ञान स्वर्गांतील अधिपति व अधिकारी यांस
मंडळीच्या द्वारें आतां कळावें; १२ त्या प्रभूच्या ठायीं
आपल्याला त्याजवरील विश्वासानें धैर्य व निर्भयपणें
प्रवेश हीं मिळालीं आहेत. १३ यास्तव मी विनंति
करितों कीं तुम्हांसाठीं जे क्लेश मला होतात त्यांच्यामुळें
तुम्हीं खचूं नये; ते तुम्हांस भूषणावह आहेत.

## शुभवृत्ताचें आकलन व्हावें म्हणून प्रार्थना

१४, १५ याकरितां स्वर्गांतील व पृथ्वीवरील प्रत्येक
वंशास ज्या पित्यावरून नांव देण्यांत येतें, त्या पित्यासमोर
मी गुडघे टेकून अशी विनंति करितों; १६ त्यानें
आपल्या ऐश्वर्याच्या संपत्तीप्रमाणें तुम्हांस असें दान द्यावें
कीं तुम्हीं त्याच्या आत्म्याच्या द्वारें अंतर्यामीं बलसंपन्न
व्हावें; १७ ख्रिस्तानें तुमच्या अंतःकरणामध्यें तुमच्या
विश्वासाच्या द्वारें वास करावा; यासाठीं कीं तुम्ही प्रीतींत
मुळावलेले व पाया घातलेले असे असून १८ तिची
रुंदी, लांबी, खोली, व उंची किती, १९ हें तुम्ही सर्व
पवित्र जनांसह समजून घ्यावयास, व बुद्धीस अगम्य
अशी ख्रिस्ताची प्रीति ओळखून घ्यावयास शक्तिमान्
व्हावें; असें कीं तुम्ही देवाच्या सर्व पूर्णतेइतके परिपूर्ण
व्हावें.

२० आपण ज्याची कांहीं मागणी किंवा कल्पना
करितों त्यापेक्षां आपल्यामध्यें कार्य करणाऱ्या शक्तीनें
फारच फार करावयास जो शक्तिमान् आहे, २१ त्याला
पिढ्यानपिढी मंडळींत व ख्रिस्त येशूमध्यें युगानुयुग
गौरव असो. आमेन.

## ख्रिस्त हा मंडळीचा मस्तक आणि म्हणून समासदांचें ऐक्य असावें

४ १ यास्तव जो मी प्रभूमध्यें बंदिवान तो
मी तुम्हांस विनंति करितों कीं तुम्हांस झालेल्या
पाचारणास शोभेल असें तुम्हीं चालावें; २ पूर्ण
नम्रतेनें, सौम्यतेनें व क्षमाशीलतेनें वागून एकमेकांचें
प्रीतीनें सहन करावें; ३ शांतीच्या बंधनानें आत्म्याचें
ऐक्य राखावयास झटत असावें; ४ तुमच्या पाचारणाची
जशी आशा एक त्याप्रमाणेंच शरीर एक व आत्मा एक
आहे. ५ एक प्रभु, एक विश्वास, एक बाप्तिस्मा, ६ एक
देव सर्वांचा पिता, तो सर्वांवर असून सर्वव्यापी व
सर्वांमध्यें आहे. ७ तरी आपल्या प्रत्येकास ख्रिस्तानें
दिलेल्या दानाच्या परिमाणाप्रमाणें कृपा दिली आहे, ८
यास्तव तो म्हणतो,

त्यानें उच्चस्थानीं आरोहण केलें तेव्हां
त्यानें पाडाव केलेल्यांस कैद करून नेलें,
आणि मनुष्यांस दानें दिलीं.

९ ( त्यानें ' उच्चस्थानीं आरोहण केलें, ' यावरून तो
प्रथम पृथ्वीच्या अधोभागीं उतरला होता, यापेक्षां दुसरें
काय समजावें ? १० जो उतरला होता तोच सर्व वस्तु
आपण भरून टाकाव्या म्हणून सर्व ऊर्ध्वलोकांवर चढला; )
११ आणि त्यानेंच कोणी प्रेषित, कोणी संदेष्टे, कोणी
सुवार्तिक, कोणी पाळक व शिक्षक असे नेमून दिले; १२
ह्यांना सेवेच्या कामासाठीं, ख्रिस्ताच्या शरीराच्या रचने-
साठीं, पवित्र जनांची पूर्णता व्हावी म्हणून देण्यांत आलें. १३
आपण सर्वांनीं देवाच्या पुत्रावरील विश्वासाच्या व तत्संबंधीं
ज्ञानाच्या एकत्वास, प्रौढ मनुष्यपणास ख्रिस्ताची पूर्णता
प्राप्त होईल अशा वृद्धीच्या मर्यादेस येऊन पोहचूं
तोंपर्यंत दिलें; १४ यासाठीं कीं आपण यापुढें बाळांसमान
असूं नये, म्हणजे मनुष्यांच्या धूर्तपणानें, भ्रांतीच्या
मार्गास नेणाऱ्या युक्तीनें, उपदेशरूपी प्रत्येक वाऱ्यानें
हेलकावणारे व फिरणारे असें होऊं नये; १५ तर आपण
प्रीतीनें सत्याला धरून मस्तक जो ख्रिस्त त्याच्या परिमा-
णानें सर्व प्रकारें वाढावें. १६ त्याजपासून अवघ्या शरीराची,
पुरवठा करणाऱ्या प्रत्येक सांध्याच्या योगें, जुळवणूक व
जमवाजमव होते, प्रत्येक अंग आपापल्या परिमाणानें
कार्य करीत असतें, आणि आपली रचना प्रीतीमध्यें
होण्यासाठीं वृद्धि करून घेतें.

## जुना जीवितक्रम व नवा जीवितक्रम

१७ यास्तव मी हें म्हणतों व प्रभूमध्यें निश्चितार्थानें
सांगतों कीं विदेशी लोक आपल्या मनाच्या भ्रष्टतेंत
चालत आहेत त्याप्रमाणें तुम्हीं अतःपर चालूं नये; १८
ते बुद्धीसंबंधानें अंधकारमय झालेले आहेत, त्यांच्यांतील
अज्ञान व त्यांच्या अंतःकरणाचा कठीणपणा यामुळें ते

ईश्वरी जीवनाला पारखे झाले आहेत; १९ ते बधिर
झाल्यामुळें त्यांनीं हावरेपणानें सर्व प्रकारची अशुद्धता करण्या-
साठीं स्वतःला कामातुरपणाच्या स्वाधीन केलें; २० परंतु
तुम्ही अशा रीतीनें ख्रिस्त शिकलां नाहीं; २१ तुम्हीं त्याचेंच
ऐकलें व येशूच्या ठायीं जें सत्य आहे त्याप्रमाणें तुम्हांला
त्याच्यामध्यें शिक्षण मिळालें; २२ असें कीं तुमच्या
पूर्वीच्या आचरणासंबंधीं जो जुना मनुष्य त्याचा तुम्हीं
त्याग करावा, तो कपटाच्या वासनांनीं युक्त असून त्याचा
नाश होणार आहे. २३ तर तुम्हीं आपल्या मनोवृत्तींत नवें
व्हावें; २४ आणि धार्मिकता व सत्याची पवित्रता यांनीं युक्त
असा देवानुरूप उत्पन्न केलेला नवा मनुष्य धारण करावा.

## दिनचर्येकरितां नियम

२५ यास्तव असत्याचा त्याग करून तुम्ही प्रत्येक जण
आपापल्या शेजाऱ्याबरोबर सत्य बोला. कारण आपण
एकमेकांचे अवयव आहों. २६ 'तुम्ही रागावा, परंतु पाप
करूं नका; तुम्ही रागावलां असतांना सूर्य मावळूं नये;'
२७ आणि सैतानाला वाव देऊं नका. २८ चोरी करणा-
ऱ्यानें पुन्हां अगदीं चोरी करूं नये; तर गरजवंताला द्याव-
यास आपल्याजवळ कांहीं असावें म्हणून जें उत्तम तें
आपल्या हातांनीं करून उद्योग करीत राहावें. २९ तुमच्या
तोंडावाटे कोणतेंहि अमंगळ भाषण न निघो, तर गरजेप्र-
माणें आध्यात्मिक उन्नतीकरितां जें कांहीं उपयुक्त तेंच मात्र
निघो, यासाठीं कीं तेणेंकरून ऐकणाऱ्यांस कृपादान प्राप्त
व्हावें. ३० देवाच्या पवित्र आत्म्याला खिन्न करूं नका;
त्याच्या योगें तुम्ही तारणाच्या दिवसापर्यंत मुद्रित झालां
आहां. ३१ सर्व प्रकारचें कटुत्व, संताप, क्रोध, कलकलाट
व अभद्र भाषण हीं, अवघ्या दुष्टपणासुद्धां तुम्हांपासून दूर
करण्यांत येवोत; ३२ आणि तुम्ही एकमेकांबरोबर उपका-
रिक व कनवाळू व्हा; जशी देवानें ख्रिस्तामध्यें तुम्हांला
क्षमा केली आहे तशी तुम्हीहि एकमेकांला क्षमा करा.

१ तर मग तुम्ही प्रिय मुलांप्रमाणें देवाचें अनुकरण
५ करणारे व्हा; २ आणि ख्रिस्तानें तुम्हांवर प्रीति केली,
आणि देवाला सुवास मिळावा म्हणून स्वतःला आप-
ल्याकरितां अर्पण व यज्ञ असें दिलें, तदनुसार तुम्हीहि
प्रीतीनें चाला.

३ जारकर्म, सर्व प्रकारची अशुद्धता व लोभ, यांचा
तुम्हांमध्यें उच्चारहि न होवो; हें पवित्र जनांस शोभतें. ४
तसेंच अमंगळपण, बाष्कळ गोष्टी व टवाळी यांचाहि
न होवो, तीं उचित नाहींत; तर त्यांऐवजीं ईशोपकार-
स्मरण होवो. ५ जारकर्मी, अशुद्ध कृति करणारा किंवा
लोभी (हा मूर्तिपूजक आहे) असल्या कोणासहि ख्रिस्ताच्या
व देवाच्या राज्यांत वारसा नाहीं हें तुम्ही जाणूनच आहां.
६ पोकळ भाषणानें कोणीं तुम्हांस फसवूं नये; कारण अशा
पापांमुळें आज्ञाभंग करणाऱ्या पुत्रांवर देवाचा कोप होतो.
७ यास्तव तुम्ही त्यांचे भागीदार होऊं नका; ८ कारण जे
तुम्ही पूर्वी अंधकार असे होतां ते तुम्ही आतां प्रभूमध्यें
प्रकाश असे आहां, प्रकाशाच्या प्रजेसारिखे चाला; ९ कारण
प्रकाशाचें फळ सर्व प्रकारचें चांगुलपण, धार्मिकता, सत्यता
यांत आहे. १० प्रभूला काय पसंत आहे हें पारखून घेत
जा; ११ अंधाराच्या निष्फळ कर्मांचे भागीदार होऊं नका,
इतकेंच नव्हे, तर त्यांचा प्रतिकार करा; १२ कारण त्या
लोकांच्या हातून गुप्तपणें जीं कर्में होतात त्यांचा उच्चार
करणें देखील लाजेचें आहे. १३ कोणताहि दोष उघडकीस
आणिला म्हणजे त्यावर प्रकाश पडतो, जें कांहीं उघड
झालेलें असतें तें प्रकाशित होतें. १४ यास्तव तो म्हणतो,
'हे निद्रिस्ता, जागा हो व मेलेल्यांतून ऊठ, म्हणजे ख्रिस्त
तुजवर प्रकाशेल.'

१५ तुम्ही अज्ञान्यांसारिखे नव्हे, तर ज्ञान्यांसारिखे
जपून वागण्याविषयीं खबरदारी घ्या. १६ संधि साधून
घ्या, कारण दिवस वाईट आहेत. १७ तुम्ही मूर्खांसारखे
होऊं नका, तर प्रभूची इच्छा काय आहे हें समजून घ्या.
१८ द्राक्षारसानें मस्त होऊं नका; त्यांत बेतालपणा आहे;
तर आत्म्यानें पूर्ण होऊन, १९ स्तोत्रें, गीतें व आत्मिक
प्रबंध हीं एकमेकांस म्हणून दाखवा; आपल्या अंतःकरणांत
प्रभूला गायनवादन करा; २० आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या
नामानें सर्व गोष्टींबद्दल सर्वदा देवपित्याचें उपकारस्मरण
करा; २१ ख्रिस्ताचें भय बाळगून एकमेकांच्या अधीन
असा.

## ख्रिस्ती कुटुंबाचा जीवनक्रम

२२ बायकांनो, तुम्ही जशा प्रभूच्या अधीन तशा

आपआपल्या नवऱ्याच्या अधीन असा. २३ कारण जसा
ख्रिस्त मंडळीचें मस्तक आहे तसा नवरा बायकोचें मस्तक
आहे; तसेंच ख्रिस्त हा शरीराचा तारणारा आहे. २४ जशी
मंडळी ख्रिस्ताच्या अधीन आहे, तसें बायकांनीहि सर्व गोष्टींत
आपापल्या नवऱ्याच्या अधीन असावें. २५ नवऱ्यांनो,
जशी ख्रिस्तानें मंडळीवर प्रीति केली आणि स्वतःचें तिच्या-
साठीं अर्पण केलें तशी तुम्हीहि आपापल्या बायकोवर प्रीति
करा; २६ यासाठीं कीं तिला त्यानें वचनरूपी जलस्नानानें
शुद्ध करून पवित्र करावें, २७ आणि तिला गौरवयुक्त
मंडळी अशी आपणास सादर करावी, म्हणजे तिला डाग,
सुरकुती किंवा अशासारखें कांहीं नसून ती पवित्र व निर्दोष
असावी. २८ त्याचप्रमाणें नवऱ्यांनीं आपापल्या बायकोला
आपलें शरीर असें मानून तिजवर प्रीति करावी. जो आपल्या
बायकोवर प्रीति करितो तो स्वतःवर प्रीति करितो. २९
कोणी कधीं आपल्या देहाचा द्वेष करीत नाहीं; तर तो त्याचें
पालनपोषण करितो; तसेंच ख्रिस्तहि मंडळीचें करितो. ३०
कारण आपण त्याच्या शरीराचे अवयव आहों. ३१ 'यामुळें
पुरुष आपल्या आईबापांस सोडून आपल्या बायकोला
जडून राहील; आणि तीं उभयतां एक देह होतील.' ३२
हें गूज मोठें आहे; हें मी ख्रिस्ताविषयीं व मंडळीविषयीं
बोलतों. ३३ तथापि तुम्ही प्रत्येक जणानें जशी
स्वतःवर तशी आपल्या बायकोवर प्रीति करावी; आणि
बायकोनें आपल्या नवऱ्याची भीड राखावी.

६ १ मुलांनो, आपल्या आईबापांची आज्ञा प्रभू-
मध्यें माना, कारण हें योग्य आहे. २ 'आपला
बाप व आई यांचा मान राख,' (ही पहिली वचन-
युक्त आज्ञा आहे); ३ 'यासाठीं कीं तुझें कल्याण व्हावें व
तूं पृथ्वीवर दीर्घायु असावें.' ४ बापांनो, तुम्ही आपल्या
मुलांस चिडवूं नका; तर प्रभूचें शिक्षण व बोध यांच्या-
योगें त्यांचा प्रतिपाल करा.

५ दासांनो, व्यवहाररीत्या जे तुमचे धनी त्यांचा
हुकूम, तो ख्रिस्ताचा असा समजून, भीत व कांपत,
सालस मनानें माना; ६ मनुष्यांस खुष करणाऱ्या लोकां-
सारिखे तोंडदेखल्या चाकरीनें नका, तर देवाची इच्छा
मनापासून पूर्ण करणाऱ्या ख्रिस्ताच्या दासांसारिखे तो
माना; ७ ही चाकरी मनुष्यांची नव्हे तर प्रभूची आहे
असें मानून सद्भावानें ती करा; ८ कारण तुम्हांला माहीत
आहे कीं कोणी जें कांहीं चांगलें करितो तेंच त्याला प्रभू-
पासून मिळेल, मग तो दास असो किंवा स्वतंत्र असो. ९
धन्यांनो, तुम्ही त्यांच्याबरोबर तसेंच वागा; धमकावणें
सोडा; कारण त्यांचा व तुमचाहि धनी स्वर्गांत आहे आणि
त्याच्याजवळ पक्षपात नाहीं, हें तुम्हांस माहीत आहे.

## ख्रिस्ती मनुष्याची शस्त्रसामग्री

१० आतां इतकेंच सांगणें आहे कीं प्रभूमध्यें व
त्याच्या पराक्रमाच्या शक्तीमध्यें सबळ व्हा. ११ सैतानाच्या
कुयुक्तींपुढें टिकावयास तुम्हीं समर्थ असावें म्हणून देवाची
संपूर्ण शस्त्रसामग्री धारण करा. १२ कारण आपलें युद्ध
रक्तमांसाबरोबर नव्हे, तर सत्ता, अधिकार, या अंधकारमय
जगाचे अधिपति, आकाशांतला दुरात्मासमूह ह्यांबरोबर
आहे. १३ यास्तव तुम्हीं वाईट दिवशीं विरोध करावयाला
व सर्व कांहीं केल्यावर टिकून राहावयाला समर्थ असावें
म्हणून देवाची संपूर्ण शस्त्रसामग्री घ्या. १४ यास्तव सत्यानें
आपली कंबर बांधून, नीतिमत्त्वरूपी उरस्त्राण धारण करून,
१५ शांतीच्या सुवार्तेनें बनलेल्या सिद्धतेच्या पादुका
पायांत घालून, १६ आणि या सर्वांखेरीज जिच्या योगें
त्या दुष्टाचे सर्व जळते बाण तुम्हांला विझवितां येतील ती
विश्वासरूपी ढाल धरून उभे राहा. १७ तारणरूपी शिर-
स्त्राण व देवाचें वचन अशी आत्म्याची तरवार, हीं घ्या;
१८ सर्व प्रकारें प्रार्थना व विनंति करा, सर्व समयीं
आत्म्याच्या प्रेरणेनें प्रार्थना करा; आणि या कामीं सर्व तत्प-
रतेनें व सर्व पवित्रजनांसाठीं विनंति करीत जागृत राहा;
१९, २० माझ्यासाठींहि विनंति करा; ती अशी कीं ज्या
सुवार्तेकरितां मी बेडींत पडलेला वकील आहें तिचें गूज
प्रशस्तपणें कळविण्यासाठीं मी तोंड उघडीन, तेव्हां मीं
काय काय बोलावें तें मला कळून यावें; यासाठीं कीं जसें
मीं बोललें पाहिजे तसें तें मला प्रशस्तपणें बोलतां यावें.

## समाप्ति

२१ माझें कसें काय चाललें आहे हें, प्रिय बंधु व
प्रभूमधील विश्वासू सेवक तुखिक हा तुम्हांस सर्व कळवील;
त्यावरून तुम्हांस समजेल; २२ आमचा समाचार तुम्हांस

कळावा व त्यानें तुमच्या अंतःकरणांचें समाधान करावें
याकरितांच मीं त्याला तुम्हांकडे पाठविलें आहे.
२३ देवपिता व प्रभु येशू ख्रिस्त यांजपासून बंधूंना
शांति व विश्वासासह प्रीति लाभो. २४ आपला प्रभु येशू
ख्रिस्त याजवर जे अक्षय प्रीति करणारे त्या सर्वांवर
कृपा असो.

# पौलाचें फिलिप्पैकरांस पत्र



### नमस्कार

१ फिलिप्पै येथील अध्यक्ष[1] व सेवक यांजसह
१ ख्रिस्त येशूमध्यें जे सर्व पवित्र जन, त्यांस येशू
ख्रिस्ताचे दास पौल व तीमथ्य यांजकडून: २ देव
आपला पिता व प्रभु येशू ख्रिस्त यांजपासून तुम्हांस कृपा
व शांति असो.

### पौलाची कृतज्ञता व आनंद

३ मला तुमची जी एकंदर आठवण आहे तिच्यावरून
मी आपल्या देवाचें उपकारस्मरण करितों; ४, ५ पहिल्या
दिवसापासून आजपर्यंत सुवार्तेच्या प्रसारांत जी तुमची
भागीदारी तिच्यामुळें तें करितों, आणि तुम्हां सर्वांसाठीं
जी माझी नेहमींची प्रत्येक विनंति ती आनंदानें करितों. ६
ज्यानें तुम्हांमध्यें चांगलें काम आरंभिलें तो तें येशू
ख्रिस्ताच्या दिवसापर्यंत सिद्धीस नेईल हा मला भरवसा
आहे; ७ आणि तुम्हां सर्वांविषयीं असें वाटणें मला योग्यच
आहे, कारण माझ्या बंधनांत आणि सुवार्तेसंबंधीं प्रत्यु-
त्तरांत व प्रतिपादनांत तुम्ही सर्व मजसह कृपेचे भागीदार
असल्यामुळें तुमचें स्मरण मी हृदयीं बाळगितों. ८ माझ्या
ठायीं असलेल्या ख्रिस्त येशूच्या कळवळ्यानें मी तुम्हां सर्वां-
साठीं किती उत्कंठित आहें ह्याविषयीं देव माझा साक्षी आहे.

### वाचकांसाठीं प्रार्थना

९ माझी ही प्रार्थना आहे कीं तुमची प्रीति ज्ञानानें व
सर्व प्रकारच्या विवेकानें उत्तरोत्तर अतिशय वाढावी; असें
कीं १० जें श्रेष्ठ तें तुम्हीं पसंत करावें; तुम्हीं ख्रिस्ताच्या
दिवसासाठीं सात्त्विक व निर्दोष असावें; ११ आणि देवाचें
गौरव व स्तुति व्हावी म्हणून येशू ख्रिस्ताच्या द्वारें जीं
नीतिमत्त्वाचीं फळें त्यांनीं तुम्हीं भरून जावें.

### त्याच्या बंदिवासाचे सुपरिणाम

१२ बंधूंनो, मला ज्या गोष्टी घडल्या त्यापासून सुवा-
र्तेला अडथळा न होतां त्या तिच्या वृद्धीला साधनीभूत
झाल्या हें तुम्हीं समजावें अशी माझी इच्छा आहे; १३
म्हणजे कैसराच्या सर्व हुजरातींत व इतर सर्वांत, माझीं
बंधनें ख्रिस्तासंबंधानें आहेत अशी त्यांची प्रसिद्धि झाली;
१४ आणि प्रभूमधील बहुतेक बंधूंनीं माझ्या बंधनांनीं
प्रभूमध्यें उत्तेजित होऊन देवाचें वचन निर्भयपणें सांगाव-
याचें अधिक धाडस केलें. १५ कित्येक हेव्यानें व
वैरभावानें ख्रिस्ताची घोषणा करितात; आणि कित्येक मित्र-
भावानें करितात; १६ मी सुवार्तेसंबंधीं प्रत्युत्तर देण्यास
नेमलेला आहें हें ओळखून ते ती प्रीतीनें करितात; १७
पण इतर आहेत ते माझीं बंधनें अधिक संकटाचीं व्हावीं
अशा इच्छेनें तट पाडण्याकरितां कुभावानें ख्रिस्ताची
घोषणा करितात.

### ख्रिस्तघोषणा होत असल्याबद्दल त्याला आनंद होतो

१८ यापासून काय होतें! निमित्तानें असो किंवा
खरेपणानें असो, सर्व प्रकारें ख्रिस्ताची घोषणा होते
हेंच; यांत मी आनंद करितों व करणारच. १९, २०
कारण मी कशानेंहि लाजणार नाहीं, तर पूर्ण धैर्यानें नेहमीं-
प्रमाणें आतांहि, जगण्यानें किंवा मरण्यानें, माझ्या शरी-

१ मुळांत: एपिस्कोप व डाकोन

राच्या द्वारें ख्रिस्ताचा महिमा होईल ही जी माझी अपेक्षा
व आशा तिच्याप्रमाणें, तें तुमच्या प्रार्थनेनें व येशू
ख्रिस्ताच्या आत्म्याच्या पुरवठ्यानें माझ्या उद्धारास कारण
होईल, हें मला ठाऊक आहे.

## जीवन कीं मरण, कोणतें चांगलें ?

२१ कारण जगणें हें मला ख्रिस्त, व मरणें हें मला
लाभ असें आहे; २२ पण जर देहांत जगणें हें माझ्या
कामाचें फळ आहे तर कोणतें निवडावें हें मला सांगतां
येत नाहीं. २३ मी या दोहोंसंबंधानें पेचांत आहें; एथून
सुटून जाऊन ख्रिस्ताजवळ असण्याची मला उत्कंठा आहे;
कारण हें त्यापेक्षां फारच चांगलें आहे; २४ तरी मी
देहांत राहणें हें तुम्हांकरितां अधिक गरजेचें आहे. २५
मला अशी खातरी वाटत असल्यामुळें मी राहणार; विश्वा-
सांत तुम्हांस वृद्धि व आनंद व्हावा म्हणून मी तुम्हां
सर्वांजवळ राहणार हें मला ठाऊक आहे; २६ यासाठीं कीं
तुम्हांकडे माझें पुनः येणें झाल्यानें, माझ्यामुळें ख्रिस्त
येशूमध्यें अभिमान बाळगण्याचें तुम्हांस अधिक कारण व्हावें.

## धैर्य धरावें म्हणून बोध

२७ इतकेंच सांगावयाचें कीं ख्रिस्ताच्या सुवार्तेस शोभेल
असें आचरण ठेवा; मी येऊन तुम्हांस भेटलों किंवा
तुम्हांकडे आलों नाहीं तरी तुम्हांसंबंधानें माझ्या
ऐकण्यांत असें यावें कीं तुम्ही एका जिवानें सुवार्तेच्या
विश्वासासाठीं एकत्र लढत एकचित्तानें स्थिर राहतां;
२८ आणि विरोध करणाऱ्या लोकांकडून कशाविषयींहि
भयभीत झालां नाहीं; हें त्यांस त्यांच्या नाशाचें पण
तुमच्या तारणाचें चिन्ह आहे, आणि तें देवापासून आहे;
२९ कारण त्याजवर विश्वास ठेवावा इतकेंच केवळ
नव्हे, तर ख्रिस्ताच्या वतीनें त्याजकरितां दुःखहि सोसावें
असा अनुग्रह तुम्हांवर झाला आहे; ३० मीं केलेलें युद्ध
तुम्हीं पाहिलें, व आतां जें मी करीत आहें म्हणून तुम्ही
ऐकतां; तेंच तुम्हीहि करीत आहां.

## ऐक्यप्रीत्यर्थ विनंति

२ १ यावरून ख्रिस्ताच्या ठायीं कांहीं आश्वासन,
प्रीतीचें कांहीं सांत्वन, आत्म्याचें कांहीं भागीपण,
कांहीं कळवळा व करुणा हीं जर आहेत, २ तर
तुम्ही समचित्त व्हा, म्हणजे एकमेकांवर सारखी प्रीति
करा आणि एकजीव होऊन एकचित्त व्हा; अशा प्रकारें
माझा आनंद पूर्ण करा.

## नम्रतेप्रीत्यर्थ विनंति

३ तुमच्या चित्तवृत्तींत तट पाडण्याचें किंवा पोकळ
अभिमान धरण्याचें कांहीं नसावें, तर लीनतेनें एकमेकांस
आपणापेक्षां श्रेष्ठ मानावें; ४ तुम्हांतील कोणीं आपलेंच
हित पाहूं नये, तर दुसऱ्यांचेंहि पाहावें.

## येशूच्या नम्रतेचें व स्वार्थत्यागाचें उदाहरण

५ असली जी चित्तवृत्ति ख्रिस्त येशूमध्यें होती ती
तुम्हांमध्येंहि असो; ६ तो देवाच्या स्वरूपाचा असूनहि
देवासमान असणें हा लाभ असा त्यानें मानिला नाहीं,
७ तर त्यानें स्वतःला रिक्त केलें, म्हणजे मनुष्याच्या
प्रतिमेचें होऊन दासाचें स्वरूप धारण केलें; ८ आणि
मनुष्यप्रकृतीचें असें प्रकट होऊन त्यानें मरण, आणि तेंहि
वधस्तंभावरचें मरण, सोशिलें; एथपर्यंत आज्ञापालन करून
त्यानें स्वतःला लीन केलें. ९ यामुळें देवानें त्याला फारच
उंच केलें, आणि सर्व नांवांपेक्षां जें श्रेष्ठ नांव तें त्याला
दिलें; १० यासाठीं कीं स्वर्गांत, पृथ्वीवर व पृथ्वीखालीं
जें कांहीं आहे त्यानें येशूच्या नामानें गुडघे टेकावे,
११ आणि देवपित्याच्या गौरवासाठीं प्रत्येक जिव्हेनें येशू
ख्रिस्त प्रभु आहे असें कबूल करावें.

## सच्छील तारणप्राप्तीचा पुरावा आहे

१२ यास्तव माझ्या प्रिय बंधूंनो, जे तुम्ही सर्वदा
आज्ञापालन करीत आलां आहां ते तुम्ही, मी जवळ
असतां केवळ नव्हे तर विशेषेंकरून आतां, म्हणजे मी
जवळ नसतांहि, भीत व कांपत आपलें तारण साधून
घ्या; १३ कारण इच्छा करणें व कृति करणें हीं तुमच्या
ठायीं आपल्या सत्संकल्पासाठीं साधून देणारा तो देव
आहे. १४ जें कांहीं तुम्ही कराल तें कुरकुर व वादविवाद
न करितां करा; १५ यासाठीं कीं या कुटिल व विपरीत
पिढींत तुम्ही निर्दोष व साळसूद, अशी देवाची निष्कलंक
प्रजा असें व्हावें; तिच्यांत तुम्ही जीवनाचें वचन पुढें
करून दाखवितांना ज्योतींसारखे जगांत दिसतां; १६ असें

झालें तर माझें धावणें व्यर्थ झालें नाहीं व माझे श्रमहि
व्यर्थ झाले नाहींत असा अभिमान बाळगण्यास मला
ख्रिस्ताच्या दिवसासाठीं कारण होईल. १७ तुमच्या
विश्वासाचा यज्ञ व सेवा होतांना जरी मी स्वतः अर्पिला
जात आहें तरी मी त्याबद्दल आनंद मानितों व तुम्हां
सर्वांसह आनंद करितों; १८ आणि त्याचाच तुम्हीहि
आनंद माना व माझ्यासह आनंद करा.

### तीमथ्य

**१९** तीमथ्याला तुम्हांकडे लौकर पाठवीन अशी मला
प्रभु येशूमध्यें आशा आहे, अशासाठीं कीं तुमच्या गोष्टी
ऐकून मलाहि धीर यावा. २० तुमच्या गोष्टींची खरी
काळजी करील असा दुसरा कोणी समानशील माझ्याजवळ
नाहीं; २१ कारण सर्व जण स्वतःच्याच गोष्टी पाहतात,
ख्रिस्त येशूच्या पाहत नाहींत; २२ पण त्याची प्रतीति
तुम्हांस आली आहे कीं जसें मूल बापाची सेवा करितें
तशी त्यानें सुवार्तेसाठीं माझ्याबरोबर सेवा केली आहे.
२३ माझें काय होणार हें समजतांच त्याला रवाना करितां
येईल अशी मला आशा आहे. २४ तरी प्रभूमध्यें मला
भरवसा आहे कीं मीहि स्वतः लौकर येईन.

### एपफ्रदीत

२५ तथापि एपफ्रदीत, माझा बंधु, सहकारी व सह-
सैनिक, आणि तुमचा दूत व माझी गरज भागवून सेवा कर-
णारा, याला तुम्हांकडे परत पाठविण्याचें अगत्य वाटलें; २६
कारण तो आजारी आहे हें तुमच्या कानीं आलें असें
त्याला समजल्यावरून त्याला तुम्हां सर्वांसाठीं हुरहुर
लागून तो चिंतातुर झाला होता; २७ त्याला खरोखरच
मृत्यु येण्याजोगें दुखणें आलें होतें; तथापि देवानें त्याज-
वर दया केली; ती केवळ त्याजवर नव्हे तर, मला दुःखावर
दुःख होऊं नये म्हणून, मजवरहि केली. २८ यास्तव मीं
त्याला पाठविण्याची अधिक त्वरा केली; तुम्ही त्याला
पाहून पुनः आनंद करावा, आणि माझें दुःख कमी व्हावें
म्हणून हें केलें. २९ यावरून प्रभूमध्यें त्याचें आगतस्वागत
पूर्ण आनंदानें करा; आणि अशांचा मान राखा; ३०
कारण माझी सेवा करण्यांत तुमच्या हातून जें उणें झालें
तें भरून काढावें म्हणून ख्रिस्तसेवेसाठीं त्यानें आपला
जीव धोक्यांत घातला व तो मरतां मरतां वांचला.

### ख्रिस्तप्राप्तीपुढें जात, कूळ, पुण्य वगैरे बाह्य हक्कांची किंमत कांहींच नाहीं

१ बंधुजनहो, आतां इतकेंच सांगणें आहे कीं
**३** प्रभूमध्यें आनंद करा. अशा गोष्टी तुम्हांस लिहिण्यास
मी कंटाळा करीत नाहीं, आणि त्या तुम्हांस दृढ
करणाऱ्या आहेत. २ त्या कुत्र्यांविषयीं सावध असा; त्या
दुष्कर्म्यांविषयीं सावध असा; केवळ दैहिक सुंता झालेल्या
लोकांविषयीं सावध असा. ३ जे आपण देवाच्या
आत्म्यानें सेवा करणारे, ख्रिस्त येशूविषयीं अभिमान
बाळगणारे व देहावर भरवसा न ठेवणारे, ते आपण सुंता
झालेलेच आहों; ४ तरी देहावरहि माझा भरवसा आहे;
जर दुसऱ्या कोणाला देहावर भरवसा ठेवावा असें वाटतें
तर मला अधिक वाटणार. ५ मी तर आठव्या दिवशीं सुंता
झालेला, इस्राएल जातीचा, बन्यामीन वंशाचा, इब्र्यांचा
इब्री; नियमशास्त्रदृष्टीनें परूशी; ६ आस्थेविषयीं म्हणाल
तर मंडळीचा छळ करणारा; नियमशास्त्रांतील नीतिमत्त्वा-
विषयीं निर्दोष ठरलेला, असा आहें.

### ख्रिस्तप्राप्तीकरतां पौलाला लागलेली उत्कंठा

७ तरी ज्या गोष्टी मला लाभाच्या होत्या त्या मी
ख्रिस्तामुळें हानीच्या अशा समजलों आहें; ८ इतकेंच
नाहीं, तर ख्रिस्त येशू माझा प्रभु, याजविषयींच्या ज्ञानाच्या
श्रेष्ठत्वामुळें मी सर्व कांहीं हानि असें समजतों; त्याच्यामुळें
मीं सर्व वस्तूंची हानि सोसिली, आणि त्या केरकचरा
अशा लेखतों; यासाठीं कीं मला ख्रिस्त हा लाभ प्राप्त
व्हावा, ९ आणि मीं त्याच्या ठायीं असलेलें असें सांपडावें.
माझें नीतिमत्त्व नियमशास्त्राच्या योगें मिळालेलें नाहीं;
तर तें ख्रिस्तावरील विश्वासानें, म्हणजे देवापासून विश्वा-
सानें मिळणारें नीतिमत्त्व असें आहे. १० हें अशासाठीं
कीं तो, त्याच्या पुनरुत्थानाचें सामर्थ्य व त्याच्या
दुःखांचें भागीपण हीं मीं त्याच्या मरणाला अनुरूप
होऊन समजून घ्यावीं; ११ म्हणजे मीं कसें तरी मृतांचें
पुनरुत्थान मिळवावें. १२ मीं इतक्यांत मिळविलें, किंवा
इतक्यांत मी पूर्ण झालों असें म्हणत नाहीं; तर ज्यासाठीं
ख्रिस्त येशूनें मला आपल्या कबजांत घेतलें तें मीं

आपल्या कबजांत घ्यावें म्हणून मी त्याच्या पाठीस लागत
आहें. १३ बंधुजनहो, मीं अद्यापि तें आपल्या कबजांत
आणलें असें मानीत नाहीं; तर मागील गोष्टींकडे दुर्लक्ष
करून व पुढील गोष्टींकडे लक्ष लावून, १४ ख्रिस्त
येशूमध्यें देवाचें जें वरील पाचारण त्यासंबंधींचा पण
जिंकण्यासाठीं मर्यादेवरील खुणेकडे धावतों; हेंच एक
माझें काम आहे. १५ तर जितके आपण प्रौढ आहों
तितक्यांनीं हाच भाव धरावा; आणि तुम्हीं एखाद्या गोष्टी-
विषयीं दुसरा भाव धरिला, तरी देव तीहि तुम्हांला प्रकट
करील; १६ इतकेंच कीं, आपण ज्या नियमानें इतकी
मजल मारिली त्याच नियमानें पुढें चालावें.

### पौलाचें अनुकरणीय उदाहरण

१७ बंधुजनहो, तुम्ही सर्व जण माझे अनुकारी व्हा,
आणि आम्हीं तुम्हांस कित्ता घातल्याप्रमाणें जे चालतात
त्यांजकडे लक्ष असूं द्या. १८ कारण मीं तुम्हांस बहुत
वेळां सांगितलें व आताहि रडत सांगतों कीं पुष्कळ
जण ख्रिस्ताच्या वधस्तंभाच्या वैऱ्यांप्रमाणें चालणारे
आहेत; १९ नाश हा त्यांचा शेवट, पोट हा त्यांचा देव,
आणि लाज हें त्यांचें गौरव आहे; त्यांचें चित्त पृथ्वी-
वरील गोष्टींवर असतें.

### ख्रिस्ती नागरिकत्व स्वर्गीय आहे

२० आपलें नागरिकत्व तर स्वर्गीय आहे तेथून प्रभु
येशू ख्रिस्त हा तारणारा असा येईल, याची आपण वाट
पाहतों; २१ ज्या सामर्थ्यानें तो सर्वच आपल्या
स्वाधीन करावयास समर्थ आहे त्या सामर्थ्यानें तो तुमचें-
आमचें नीचावस्थेंतील शरीर स्वतःच्या गौरवावस्थेंतील
शरीरासारखें व्हावें म्हणून त्याचें रूपांतर करील.

### सद्बोध

१ यास्तव माझ्या प्रिय बंधूंनो, तुम्हांकडे माझें
४ लक्ष लागून राहिलें आहे; तुम्ही माझा आनंद व
मुगूट आहां; प्रियजनहो, तुम्ही प्रभूमध्यें तसेच स्थिर
राहा. २ मी युवदीयेला विनंति करितों व सुंतुखेला विनंति
करितों कीं तुम्ही प्रभूच्या ठायीं एकचित्त व्हा; ३ आणि
माझ्या जोडीच्या हे खऱ्या सोबत्या, मी तुलाहि विनंति
करितों कीं ह्या ज्या स्त्रियांनीं सुवार्तेच्या कामीं मजबरोबर
श्रम केले त्यांना साहाय्य कर; तसेंच क्लेमेंत व ज्यांचीं
नांवें जीवनी पुस्तकांत आहेत असे माझे बाकीचे सहकारी
यांनाहि कर.

४ प्रभूमध्यें सर्वदा आनंद करा; पुनःहि सांगतों, आनंद
करा. ५ तुमची सौम्यता सर्वांस कळो. प्रभु जवळ आहे.
६ कशाचीहि काळजी करूं नका तर सर्व गोष्टींविषयीं
प्रार्थना व विनंति करून आभारप्रदर्शनासह आपलीं
मागणीं देवाला कळवा; ७ म्हणजे सर्व बुद्धिसामर्थ्याच्या
पलीकडे असलेली देवाची शांति तुमचीं अंतःकरणें व
तुमचे विचार ख्रिस्त येशूमध्यें राखील.

८ बंधुजनहो, शेवटीं इतकें सांगतों कीं जें कांहीं सत्य,
जें कांहीं सन्मान्य, जें कांहीं न्याय्य, जें कांहीं शुद्ध,
जें कांहीं प्रिय, जें कांहीं सुश्राव्य, जो कांहीं सद्गुण, जी
कांहीं स्तुति, त्यांचें मनन करा. ९ जें तुम्ही शिकलां,
जें स्वीकारलें, व माझें ऐकलेंपाहिलें तें आचरा; म्हणजे
शांतीचा देव तुम्हांबरोबर राहील.

### फिलिप्पैकरांनीं दाखविलेल्या ममताळूपणाबद्दल पौलाची कृतज्ञता

१० मला प्रभूच्या ठायीं मोठा आनंद झाला कीं आतां
तरी तुमची मजविषयींची काळजी पुनः जागृत झाली;
ही काळजी तुम्ही करीतच होतां, पण तुम्हांस संधि
नव्हती. ११ मला उणें असल्यामुळें मी बोलतों असें
नाहीं; कारण ज्या स्थितींत मी असेन तींत तृप्त राहण्यास
शिकलों आहें. १२ अडचणींत राहणें मला समजतें, संपन्नतें-
तहि राहणें समजतें; प्रत्येक प्रसंगीं व सर्व प्रसंगीं अन्नतृप्त
असणें, व क्षुधित असणें, संपन्न असणें व विपन्न असणें,
ह्याचें शिक्षण मला मिळालें आहे. १३ मला सामर्थ्य
देणाऱ्याच्या ठायीं मीं सर्व कांहीं करावयास शक्तिमान्
आहें. १४ तथापि माझ्या संकटांत तुम्ही माझे सहभागी
झालां हें ठीक केलें. १५ फिलिप्पैकरांनो, तुम्हांसहि ठाऊक
आहे कीं सुवार्तेच्या प्रारंभीं, मी मासेदोनियाहून निघालों,
तेव्हां फक्त तुम्हांवांचून कोणत्याहि मंडळीनें मजबरोबर
देण्याघेण्याचा व्यवहार केला नाहीं; १६ मी थेस्सलनीकांत
होतों तेव्हांच माझ्या गरजेसाठीं तुम्हीं एकदाच नाहीं,
दोनदा पैसे पाठविले. १७ मी दानाची इच्छा धरितों असें

नाहीं; तर तुमच्या हिशेबीं जमा होणारें फळ बहुत व्हावें
अशी इच्छा धरितों. १८ मला पाहिजे तें सर्व मजजवळ
आहे आणि अधिकहि आहे; तुम्हांपासून आलेलें दान
एपफ्रदीताच्या हातून मिळाल्यानें मला भरपूर झालें; तें
जसा काय सुगंध, जसा काय देवाला मान्य व संतोषकारक
यज्ञ, असें आहे. १९ माझा देव आपल्या संपत्त्यनुरूप
तुमची सर्व गरज ख्रिस्त येशूमध्यें गौरवानें पुरवील. २०
आपला देवपिता याला युगानुयुग गौरव असो. आमेन.

### शेवटचा निरोप

२१ ख्रिस्त येशूमधील प्रत्येक पवित्र जनाला सलाम
सांगा. माझ्याबरोबरचे बंधु तुम्हांस सलाम सांगतात. २२
सर्व पवित्र जन व विशेषेंकरून कैसराच्या घरचे तुम्हांस
सलाम सांगतात.
२३ प्रभु येशू ख्रिस्ताची कृपा तुमच्या आत्म्यावर असो.

---

# पौलाचें कलस्सैकरांस पत्र

### नमस्कार

१ कलस्सै एथील पवित्र जनांस व ख्रिस्तांतील
1 विश्वास ठेवणाऱ्या बंधूंस, देवाच्या इच्छेनें ख्रिस्त
येशूचा प्रेषित पौल व तीमथ्य बंधु यांजकडून; २ देव
आपला पिता याजपासून तुम्हांस कृपा व शांति असो.

### ईशोपकारस्मरण व प्रार्थना

३,४ ख्रिस्त येशूमधील तुमचा विश्वास व तुमची सर्व
पवित्र जनांवरील प्रीति, यांविषयीं ऐकून, आम्ही तुम्हांसाठीं
जेव्हां प्रार्थना करितों तेव्हां स्वर्गांत तुम्हांसाठीं राखून
ठेविलेल्या आशेमुळें आम्ही सर्वदा आपल्या प्रभु येशू
ख्रिस्ताचा पिता देव याचें उपकारस्मरण करितों. ५ त्या
आशेविषयीं तुम्हीं सुवार्तेच्या सत्यवचनांत पूर्वी ऐकलें. ६
ही सुवार्ता तुम्हांकडे येऊन पोहंचली आहे; तुम्हीं देवाच्या
कृपेविषयीं ऐकलें व खरेपणानें तिची माहिती करून घेतली,
त्या दिवसापासून जशी तुम्हांमध्यें तशीच सर्व जगांतहि ती
फळ देत व वृद्धिंगत होत चालली आहे. ७ एपफ्रास आमच्या
सोबतीचा प्रिय दास, तुमच्या वतीनें ख्रिस्ताचा विश्वासू
सेवक, त्याजपासून तुम्ही ती कृपा अशीच शिकलां. ८
आत्म्याच्या योगें झालेल्या तुमच्या प्रीतीविषयीं त्यानेंच
आम्हांस कळविलें.
९ यावरून आम्हीहि तें ऐकल्या दिवसापासून तुम्हां-
साठीं प्रार्थना व विनंति केल्याशिवाय राहत नाहीं; ती अशी
कीं सर्व आध्यात्मिक ज्ञान व बुद्धि यांच्याद्वारें तुम्हीं त्याच्या
इच्छेसंबंधी ज्ञानानें भरावें; १० यासाठीं कीं तुम्हीं सर्व
प्रकारें प्रभूला संतोषविण्याकरितां त्याला शोभेल असें
वागावें, म्हणजे प्रत्येक प्रकारच्या सत्कर्माचें फळ यावें
आणि देवाच्या ज्ञानानें तुमची वृद्धि व्हावी; ११ सर्व
प्रकारची सहनता व धीर हीं तुम्हांस आनंदासह प्राप्त
व्हावीं म्हणून त्याच्या गौरवाच्या पराक्रमानुसार तुम्हीं सर्व
प्रकारच्या सामर्थ्यानें समर्थ व्हावें; १२ आणि ज्यानें
आपल्याला प्रकाशांतील पवित्र जनांच्या वतनाचे
विभागी होण्याजोगें केलें त्या पित्याचें उपकारस्मरण
करावें. १३ त्यानें आपल्याला अंधाराच्या सत्तेतून
काढून आपल्या प्रिय पुत्राच्या राज्यांत आणून ठेविलें;
१४ त्या पुत्राच्या ठायीं आपल्याला मुक्ति म्हणजे आपल्या
पापांची क्षमा प्राप्त झाली आहे.

### ख्रिस्ताचें स्वरूप व त्याचें कार्य

१५ तो अदृश्य देवाची प्रतिमा आहे; तो सर्व
उत्पत्तींत ज्येष्ठ आहे; १६ कारण आकाशांत व पृथ्वीवर
असलेलें; दृश्य व अदृश्य असलेलें; राजे, अधिपति, सत्ता-
धीश किंवा अधिकारी असलेले; तें सर्व त्याच्यामध्यें
उत्पन्न झालें; सर्व त्याच्याद्वारें व त्याच्यासाठीं उत्पन्न

झालें; १७ तो सर्वांच्या पूर्वीचा आहे व त्याच्यामध्यें सर्व
समाविष्ट होतात. १८ तोच शरीराचें म्हणजे मंडळीचें
मस्तक आहे; तो आदि, मृतांतून प्रथम जन्मलेला आहे;
अशासाठीं कीं सर्वांमध्यें त्याला प्राधान्य मिळावें; १९
सर्व पूर्णता त्याच्यांत वसावी; २० आणि त्याच्या वध-
स्तंभावरील रक्ताच्या द्वारें शांति करून तद्द्वारें सर्व, तें
पृथ्वीवरील असो किंवा स्वर्गांतील असो, त्याचा स्वतः-
बरोबर त्याच्याद्वारें समेट करणें हें पित्याला बरें वाटलें.
२१ तुम्ही जे पूर्वी दुष्कर्मे करीत मनानें परके व वैरी
होतां, २२ त्या तुमचा आतां त्यानें स्वतःच्या मांसमय
शरीरांत मरणाच्या द्वारें समेट केला आहे, यासाठीं कीं
त्यानें तुम्हांस पवित्र, निष्कलंक व निर्दोष असें आपणा-
समोर उभें करावें. २३ जर तुम्ही विश्वासांत स्थिरावलेले
व अढळ राहतां, आणि जी सुवार्ता तुम्हीं ऐकली, आकाशा-
खालच्या सर्व सृष्टींत जिची घोषणा झाली व जिचा
मी पौल सेवक झालों आहें, तिच्या आशेपासून तुम्ही
ढळलां नाहीं तर हें होईल.

### ख्रिस्ती मंडळीच्या वाढीप्रीत्यर्थ पौल ख्रिस्ताचा सहकारी

२४ तुम्हांसाठीं जीं माझीं दुःखें त्यांमध्यें मी आनंद
करतों, आणि ख्रिस्ताच्या क्लेशांतलें जें उरलें आहे तें मी
आपल्या देहानें, त्याचें शरीर जी मंडळी तिच्यासाठीं भरून
काढितों; २५ देवाच्या वचनाची पूर्ण सेवा करावयास जो
कारभार तुम्हांसाठीं मला सोपवून दिला, त्याप्रमाणें मी
त्या मंडळीचा सेवक झालों. २६ जें गूज युगानुयुग
पिढ्यानपिढी गुप्त ठेविलें होतें, परंतु आतां त्याच्या पवित्र
जनांस प्रकट झालें तें, वचन आहे; २७ राष्ट्रांत त्या
गुजाच्या गौरवाची संपत्ति काय आहे हें त्यांस कळविणें
देवाला बरें वाटलें; गौरवाची आशा असा जो ख्रिस्त
तुम्हांमध्यें आहे तोच तें गूज आहे. २८ आम्ही त्याची
घोषणा करितों, सर्व प्रकारच्या ज्ञानानें प्रत्येक मनुष्याला
बोध करितों व प्रत्येक मनुष्याला शिकवितों; अशासाठीं कीं
प्रत्येक मनुष्याला ख्रिस्तामध्यें पूर्ण असें उभें करावें; २९
ह्याकरितां त्याची जी शक्ति माझ्या ठायीं जोरानें कार्य
चालविते तिच्या मानानें मी झटून श्रम करितों.

२ १ तुम्हांसाठीं, लावदिकीयांतल्या लोकांसाठीं, व
ज्या इतरांनीं माझें तोंड प्रत्यक्ष पाहिलें नाहीं त्या
सर्वांसाठीं, मला केवढा प्रयास पडत आहे हें
तुम्हीं समजून घ्यावें अशी माझी इच्छा आहे; २ तो
प्रयास यासाठीं कीं त्यांच्या मनांस समाधान व्हावें;
प्रेमानें त्यांनीं एकमेकांशीं बांधलें जावें; ज्ञानाची पूर्ण
खातरी ही संपत्ति त्यांना विपुल मिळावी; व देवाचें
गूज म्हणजे ख्रिस्त याचें ज्ञान त्यांस समजून यावें.
३ त्या ख्रिस्तामध्यें ज्ञानाचे व बुद्धीचे सर्व गुप्तनिधि
आहेत.

### ख्रिस्ताशीं संयुक्त होणें

४ लाघवी भाषणानें कोणीं तुम्हांस भुलवूं नये म्हणून
हें सांगतों; ५ कारण जरी मी देहानें दूर आहें, तरी
आत्म्यानें तुम्हांजवळ आहें. आणि तुमची सुव्यवस्था व
ख्रिस्तावरील तुमच्या विश्वासाचा स्थिरपणा पाहत असून
आनंद करीत आहें.
६ तर ख्रिस्त येशू जो प्रभु, याला जसें तुम्हीं
स्वीकारिलें तसें त्यामध्यें चाला; ७ त्यामध्यें मुळावलेले,
रचिले गेलेले, तुम्हांस शिकविल्याप्रमाणें विश्वासांत बळावत
जाणारे, आणि फार ईशोपकारस्मरण करणारे असे व्हा.

### खोट्या शिक्षणाविरुद्ध इशारा

८ ख्रिस्ताप्रमाणें नव्हे, तर मनुष्यांच्या संप्रदायाप्रमाणें,
जगाच्या प्राथमिक शिक्षणाप्रमाणें असलेलें ज्ञान व पोकळ
भुलथापा यांनीं तुम्हांस कोणीं हिरावून घेऊन जाऊं नये
म्हणून जपा; ९ कारण ख्रिस्ताच्या ठायींच देवपणाची
सर्व पूर्णता मूर्तिमान् वसते, १० आणि जो सर्व
सत्तेचें व अधिकाराचें मस्तक त्यामध्यें तुम्ही पूर्ण
केलेले आहां. ११ त्यामध्यें तुमची, देहस्वभावरूप
शरीर काढून टाकल्यानें जी ख्रिस्ताची सुंता, म्हणजे
हातांनीं न केलेली सुंता, ती झाली आहे. १२ तुमचा
बाप्तिस्मा झाला तेव्हां तुम्ही त्याजबरोबर पुरले गेलां,
आणि ज्यानें त्याला मेलेल्यांतून उठविलें त्या देवाच्या
कृतीवरील विश्वासाच्याद्वारें त्याजबरोबर उठविलेहि गेलां.
१३ जे तुम्ही आपल्या अपराधांनीं व देहस्वभावाच्या
बेसुंतीपणानें मेलेले होतां त्या तुम्हांस त्यानें त्याजबरोबर

जीवंत केलें, त्यानें आपल्या सर्व अपराधांची क्षमा केली; १४ आपल्याविरुद्ध असलेला जो विधींचा दस्तऐवज आपल्याला प्रतिकूल होता तो त्यानें खोडला व वधस्तंभाला खिळून रद्द केला. १५ त्यानें सत्ताधीशांस व अधिकाऱ्यांस नाडून त्यांजविरुद्ध वधस्तंभावर जयोत्सव करून त्यांचें उघडउघड प्रदर्शन केलें.

१६ तर मग खाण्याविषयीं किंवा पिण्याविषयीं, तसेंच सण, अमावास्या किंवा शब्बाथ ह्यांविषयीं कोणीं तुमचा न्यायनिवाडा करूं नये; १७ ह्या बाबी भावी गोष्टींचें प्रतिबिंब आहेत; शरीर तर ख्रिस्ताचें आहे. १८ आपण ज्या गोष्टी पाहिल्या आहेत त्यांवर टेकून जो देहबुद्धीनें व्यर्थ फुगतो असा कोणी, नम्रता व देवदूतांची सेवा यांच्या योगानें तुम्ही आपल्या बक्षिसास मुकाल, असें तुम्हांस न फसवो; १९ तो मस्तकाला धरून राहत नाहीं; त्या मस्तकापासून सर्व शरीराला संधि व बंधनें यांच्या योगें पुरवठा होऊन व तें दृढ जडलें जाऊन त्याची ईश्वरी वृद्धि होते.

२० तुम्ही जगाच्या प्राथमिक शिक्षणास ख्रिस्ताबरोबर मेलां आहां तर जगाला जीवंत असल्यासारखे विधि कां मानितां? २१, २२ (उपभोगानें नष्ट होणाऱ्या वस्तु) हातीं धरूं नको, चाखूं नको, स्पर्शूं नको, असे जे मनुष्यांच्या आज्ञांचे व शिक्षणाचे विधि आहेत ते कां मानितां? २३ याला स्वेच्छासेवा, दीनभाव व देहदंडन यांवरून ज्ञानाचें नांव आहे खरें, तरी देहस्वभावाच्या तृप्तीला प्रतिबंध करण्याची त्यांची योग्यता नाहीं.

## ख्रिस्ताबरोबर पुनरुत्थित होण्याचे परिणाम

**३** १ यास्तव तुम्ही ख्रिस्ताबरोबर जर उठविले गेलां, तर ख्रिस्त देवाच्या उजवीकडे जेथें बसला आहे तेथल्या वरील गोष्टी मिळवावयाचा यत्न करा. २ वरील गोष्टींकडे मन लावा, पृथ्वीवरील गोष्टींकडे लावूं नका. ३ कारण तुम्ही मृत झालां आणि तुमचें जीवन ख्रिस्ताबरोबर देवामध्यें गुप्त ठेविलेलें आहे. ४ आपलें जीवन जो ख्रिस्त तो प्रकट होईल तेव्हां तुम्हीहि त्याजबरोबर गौरवांत प्रकट व्हाल.

५ तर पृथ्वीवरील तुमचे अवयव जिवें मारा, म्हणजे जारकर्म, अमंगळपणा, कामवासना, कुवासना व लोभ (ह्याला मूर्तिपूजा म्हणावें,) यांस जिवें मारा; ६ त्यामुळें देवाचा कोप आज्ञाभंगाच्या पुत्रांवर होतो. ७ तुम्ही पूर्वी त्या वासनांत जगत होतां तेव्हां त्यामध्यें तुम्हीहि वागत होतां; ८ परंतु आतां क्रोध, संताप, दुष्टपण, मुखानें निंदा व शिवीगाळ करणें, हीं सर्व आपणांपासून दूर करा; ९ एकमेकांबरोबर लबाडी करूं नका; कारण तुम्ही जुन्या मनुष्यास त्याच्या कृतीसुद्धां काढून टाकिलें आहे; १० आणि जो नवा मनुष्य, त्यास अस्तित्वांत आणणाऱ्याच्या प्रतिरूपाप्रमाणें पूर्ण ज्ञानांत नवा केला जात आहे, त्याला अंगीं ल्यालां आहां; ११ यांत हेल्लेणी व यहूदी, सुंता व बेसुंता, बर्बर व स्कुथी, दास व स्वतंत्र हें नाहीं; तर ख्रिस्त सर्व कांहीं, आणि सर्वांत आहे.

१२ तुम्ही देवाचे पवित्र व प्रिय असे निवडलेले लोक आहां, म्हणून करुणायुक्त हृदय, ममता, नम्रभाव, लीनता, सहनशीलता हीं अंगीं ल्या; १३ एकमेकांचें सहन करा, आणि कोणाविरुद्ध कोणाचें गाऱ्हाणें असल्यास आपसांत क्षमा करा; प्रभूनें तुम्हांला क्षमा केली तशी तुम्हीहि करा; १४ पूर्णता करणारें बंधन अशी जी प्रीति तीं या सर्वांवर अंगीं ल्या. १५ ख्रिस्ताची शांति तुमच्या अंतःकरणांत राज्य करो; तिजकरितां तुम्हांला एकशरीर असें पाचारण्यांत आलें आहे; आणि तुम्ही कृतज्ञ असा. १६ ख्रिस्ताचें वचन तुम्हांमध्यें सर्व ज्ञानानें भरपूर राहो; स्तोत्रें, गीतें व आध्यात्मिक स्तवनें यांनीं परस्परांस शिकवण द्या व बोध करा; आपल्या अंतःकरणांत देवाला कृपेच्या प्रेरणेनें गा; १७ आणि बोलणें किंवा करणें, जें कांहीं तुम्ही करितां, तें सर्व प्रभु येशूच्या नामानें करा; आणि त्याच्या द्वारें देव जो पिता त्याचें उपकारस्मरण करा.

## ख्रिस्ती मनुष्याचें गृहजीवन

१८ बायकांनो, जसें प्रभूमध्यें उचित आहे त्याप्रमाणें तुम्ही आपापल्या नवऱ्याच्या अधीन असा. १९ नवऱ्यांनो, तुम्ही आपापल्या बायकोवर प्रीति करा, व तिजबरोबर निष्ठुरतेनें वागूं नका. २० मुलांनो, तुम्ही सर्व गोष्टींत आपल्या आईबापांची आज्ञा माना, हें प्रभूला आवडतें आहे. २१ बापांनो, तुम्ही आपल्या मुलांना चिडवूं नका,

चिडवाल तर तीं खिन्न होतील. २२ दासांनो, तुम्ही सर्व
गोष्टींत आपल्या व्यवहारांतल्या धन्यांच्या आज्ञा माना,
मनुष्यांस संतोषविणाऱ्या नौकरांसारखें तोंडदेखल्या चाक-
रीनें नका, तर सालस मनानें प्रभूची भीति बाळगून त्यांला
माना; २३ आणि जें कांहीं तुम्ही करितां तें मनुष्यांसाठीं
म्हणून नका तर प्रभूसाठीं म्हणून जिवेंभावें करा. २४ प्रभू-
पासून वतनरूप प्रतिफळ तुम्हांस मिळेल हें तुम्हांस माहीत
आहे; प्रभु ख्रिस्त याची चाकरी करा. २५ अन्याय
करणाऱ्यानें केलेला अन्याय त्याजकडे परत येईल; पक्षपात
होणार नाहीं.

४ १ धन्यांनो, तुम्हांसहि स्वर्गांत धनी आहे हें
लक्षांत बाळगून तुम्ही आपल्या दासांबरोबर न्यायानें
व ममतेनें वागा.

२ प्रार्थनेंत तत्पर असा व तिच्यांत ईशोपकारस्मरण
करीत जागृत राहा; ३ आणखी आम्हांसाठींहि प्रार्थना करा,
अशी कीं ख्रिस्ताच्या ज्या गुजामुळें मी बंधनांतहि आहें तें
सांगावयास देवानें आम्हांसाठीं वचनाचें दार उघडावें;
४ यासाठीं कीं जसें मला बोललें पाहिजे तसें बोलून मीं
तें गूज प्रकट करावें. ५ बाहेरच्या लोकांबरोबर सुज्ञतेनें
वागा; संधि साधून घ्या. ६ तुमचें बोलणें सर्वदा कृपायुक्त,
मिठानें रुचकर केल्यासारखें असावें, म्हणजे प्रत्येकाला
कसकसें उत्तर द्यावयाचें हें तुम्हीं समजावें.

### नमस्कार व समाप्ति

७ प्रिय बंधु तुखिक, प्रभूमधील विश्वासू सेवक व
माझा सोबतीचा दास, हा माझें कसें काय चाललें आहे तें
तुम्हांस कळवील; ८ त्याला मीं तुम्हांकडे यासाठींच पाठ-
विलें कीं आमचें वर्तमान तुम्हांस कळावें व त्यानें तुमच्या
मनाचें समाधान करावें. ९ त्याजबरोबर विश्वासू व प्रिय
बंधु अनेसिम, तुम्हांतला एक, यालाहि पाठविलें आहे; ते
एथील सर्व मजकूर तुम्हांस कळवितील.

१० माझा सोबती बंदिवान अरिस्तार्ख तुम्हांस सलाम
सांगतो, आणि बर्णबाचा बंधु मार्क हाहि सलाम सांगतो,
(त्याजविषयीं तुम्हांस आज्ञा मिळाल्या आहेत; तो
तुम्हांकडे आला तर त्याचा स्वीकार करा;) ११ युस्त
नांवाचा येशू सलाम सांगतो; हे सुंतेचे बंधु आहेत; हे
मात्र देवाच्या राज्याकरितां माझे सहकारी आहेत व ते
माझें सांत्वन असे झाले. १२ ख्रिस्त येशूचा दास एपफ्रास
जो तुमच्यांतलाच आहे तो तुम्हांस सलाम सांगतो; तो
आपल्या प्रार्थनांमध्यें सर्वदा तुम्हांसाठीं जीव तोडून विनंति
करीत आहे, कीं ईश्वरेच्छेनें प्राप्त झालेल्या सर्व स्थितींत
तुम्हीं परिपूर्ण व निर्भ्रांत असें स्थिर राहावें. १३ त्याज-
विषयीं मी साक्ष देतों कीं तुम्हांसाठीं व जे लावदिकीयांत व
हेरापलींत आहेत त्यांच्यासाठीं तो फार श्रम करीत आहे.
१४ प्रिय वैद्य लूक व देमास हे तुम्हांस सलाम सांगतात.
१५ लावदिकीयांतील बंधु, नुंफा व तिच्या घरीं जमणारी
मंडळी यांस सलाम सांगा. १६ हें पत्र तुमच्यांत वाचून
दाखविल्यावर लावदिकीयांतील मंडळींतहि वाचण्यांत यावें;
व लावदिकीयास गेलेलें पत्र आणवून तुम्हींहि वाचावें अशी
व्यवस्था करा. १७ अर्खिप्पाला सांगा कीं जी सेवा तुला
प्रभूमध्यें मिळाली आहे ती पूर्ण करण्यास तिकडे लक्ष दे.

१८ मीं पौलानें स्वहस्तें लिहिलेला सलाम. माझ्या
बंधनांची आठवण ठेवा. तुम्हांवर कृपा असो.

# पौलाचें थेस्सलनीकाकरांस पहिलें पत्र



### नमस्कार व ईशोपकारस्मरण

१ १ देवपित्यांत व प्रभु येशू ख्रिस्तांत जी
थेस्सलनीकाकरांची मंडळी तिला पौल, सिल्वान व
तीमथ्य यांजकडून; तुम्हांस कृपा व शांति असो.

२ आम्ही आपल्या प्रार्थनांमध्यें तुमची आठवण करीत
सर्वदा तुम्हां सर्वांविषयीं देवाचें उपकारस्मरण करितों, ३
आपल्या देवपित्यासमोर तुमचें विश्वासाचें काम, प्रीतीचे
श्रम, व आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताविषयींच्या आशेचा धीर

ह्यांचें आम्ही निरंतर स्मरण करितों. ४ देवाच्या प्रीतीं-
तील बंधूंनो, तुमची झालेली निवडणूक आम्हांस ठाऊक
आहेच; ५ कारण आमची सुवार्ता केवळ शब्दानें नव्हे,
तर सामर्थ्यानें, पवित्र आत्म्यानें व बहुत निर्धारानें तुम्हांस
कळविण्यांत आली; तसेंच तुम्हांकरितां आम्ही तुम्हांमध्यें
कसे होतों हें तुम्हांस ठाऊक आहे. ६ तुम्ही फार संकटांत
असतांना पवित्र आत्म्याच्या द्वारा मिळालेल्या आनंदानें
वचन स्वीकारून आमचे व प्रभूचे अनुकारी झालां; ७
अशानें मासेदोनिया व अखया यांतील सर्व विश्वास ठेव-
णारे यांस तुम्ही कित्ता झालां. ८ मासेदोनिया व अखया
यांत तुम्हांपासून प्रभूचें वचन गाजत गेलें, इतकेंच केवळ
नव्हे तर देवावरील तुमच्या विश्वासाचें वर्तमानहि सर्वत्र
पसरलें आहे; यामुळें त्याविषयीं आम्हांस कांहीं
सांगावयाचें अगत्य नाहीं. ९ कारण तुम्हांमध्यें आमचें येणें
कोणत्या प्रकारचें झालें; सदाजीवी व सत्य देवाची सेवा
करण्यास, १० आणि त्यानें ज्याला मेलेल्यांतून उठविलें व
भावी क्रोधापासून आपल्याला सोडविणारा असा त्याचा
पुत्र येशू याची स्वर्गांतून येण्याची वाट पाहण्यास, तुम्ही
मूर्तीपासून देवाकडे कसे वळलां, हें ते स्वतः होऊन
आम्हांविषयीं सांगतात.

## आपल्या मिशनरी कामाचें पौल समर्थन करतो

२ १ बंधुजनहो, तुम्हांमध्यें आमचें येणें व्यर्थ झालें
नाहीं, हें तुम्हां स्वतःला माहीत आहेच. २ पूर्वी
फिलिप्पैंत आम्हीं दुःख भोगून व दांडगाई सोसून
तुम्हांस माहीतच आहे ) मोठ्या कष्टांत असतां
देवाची सुवार्ता तुम्हांस सांगण्याचें धैर्य आपल्या देवाकडून
आम्हांस मिळालें. ३ आमचा उपदेश भ्रांति अगर अमंगळ-
पण यांपासून उत्पन्न झालेला नसून कपटाचा नव्हता; ४
तर सुवार्ता सांगण्याचें काम आम्हांस सोपवून देणें देवाला
पसंत वाटल्यावरून आम्ही ती सांगतों; आम्ही मनुष्यांस
खुश करण्यासारखें न बोलतां आमचीं 'अंतःकरणें पार-
खणारा' देव हा खुश होईल असें बोलतों. ५ आम्ही
आर्जवाचें भाषण करितांना कधीं आढळलों नाहीं, हें
तुम्हांस माहीत आहे; तसेंच लोभानें कपटवेष धारण
केलेले असे आम्ही कधीं आढळलों नाहीं, देव साक्षी
आहे; ६ आम्ही ख्रिस्ताचे प्रेषित असल्यामुळें जरी आमचें
वजन पडण्यासारखें होतें तरी मनुष्यांपासून म्हणजे तुम्हां-
पासून किंवा दुसऱ्यांपासून गौरव मिळविण्याची खटपट
करितांना आम्ही आढळलों नाहीं; ७ तर आपल्या मुला-
बाळांचें लालनपालन करणाऱ्या दाईसारखे आम्ही तुम्हां-
मध्यें सौम्यवृत्ति होतों. ८ आम्हांस तुमचा कळवळा वाटत
असल्यामुळें आम्ही तुम्हांला देवाच्या सुवार्तेचें केवळ
दान देण्यास नव्हे, तर तुम्हांवरील आमच्या अत्यंत
प्रेमामुळें तुम्हांकरितां आपला जीवहि देण्यास राजी होतों.
९ बंधूंनो, आमचे श्रम व कष्ट यांची आठवण तुम्हांस
आहे; तुम्हांतील कोणाला आमचा भार होऊं नये म्हणून
आम्हीं रात्रंदिवस धंदा करून तुम्हांस देवाच्या सुवार्तेची
घोषणा केली. १० तुम्हां विश्वास ठेवणाऱ्यांत आम्ही
पवित्रतेनें, धार्मिकतेनें व निर्दोषतेनें कसे होतों याविषयीं
तुम्ही साक्षी आहां, व देवहि आहे. ११ तुम्हांस ठाऊकच
आहे कीं जसा बाप आपल्या मुलांस तसें आम्ही तुम्हांतील
प्रत्येकास बोध करीत, धीर देत, व आग्रहपूर्वक विनंति
करीत सांगत होतों कीं, १२ जो देव आपल्या राज्यांत व
गौरवांत तुम्हांस पाचारण करीत आहे त्याला योग्य असें
तुम्हीं वागावें.

## छळ

१३ आम्हीहि देवाचें निरंतर उपकारस्मरण यामुळें
करितों कीं तुम्हीं आम्हांपासून ऐकलेलें देववचन स्वीकारिलें
तें मनुष्यांचें म्हणून नव्हे, तर देवाचें असें स्वीकारिलें;
आणि वास्तविक तें तसेंच आहे; तें तुम्हां विश्वास ठेवणा-
ऱ्यांत कार्य करीत आहे. १४ बंधूंनो, यहूदीयांतील
देवाच्या ज्या मंडळ्या ख्रिस्त येशूमध्यें आहेत त्यांचे
तुम्ही अनुकारी झालां, म्हणजे त्यांनीं यहूद्यांच्या हातून
जीं दुःखें सोशिलीं तींच तुम्हीहि आपल्या देशबांधवांच्या
हातून सोशिलीं; १५ त्या यहूद्यांनीं प्रभु येशूला व संदेष्ट्यां-
लाहि जिवें मारिलें आणि आम्हांस छळ करून बाहेर
घालविलें; देवाला जें प्रिय तें न करितां ते सर्व मनुष्यांचे
विरोधी झाले आहेत; १६ विदेशी लोकांचें तारण व्हावें
म्हणून त्यांच्याबरोबर बोलण्याची ते आम्हांस मनाई
करितात, हें ह्यासाठीं कीं त्यांनीं आपल्या 'पापांचें माप'

सर्वदा 'भरीत असावें'; त्यांजवरील क्रोधाची सीमा झाली आहे.

### पौलाचें आपल्या वाचकांकडे लक्ष

१७ बंधुजनहो, आम्ही हृदयानें नव्हे तर देहरूपानें तुम्हांपासून थोडका वेळ वेगळे झाल्यानें आम्हांस विरहदुःख होऊन तुमचें तोंड पाहावयास आम्हीं फार उत्कंठेनें विशेष प्रयत्न केला; १८ या उत्कंठेमुळें आम्हीं तुम्हांकडे येण्याचा बेत केला; मीं पौलानें एकदा नाहीं तर दोनदा केला; परंतु सैतानानें आम्हांस अडविलें. १९ आमची आशा, आमचा आनंद, आमचा अभिमानाचा मुगूट काय आहे? आपला प्रभु येशू याच्या आगमनसमयीं त्याच्यासमोर तुम्हीच आहां ना? २० कारण तुम्ही आमचें गौरव व आमचा आनंद आहां.

### तीमथ्याकडे सोंपलेली कामगिरी

३ १ आमच्यानें आणखी दम धरवेना, तेव्हां आम्हीं अथेनैंतच एकटें मार्गें राहावें, हें आम्हांस बरें वाटलें; २ आणि आम्हीं आपला बंधु तीमथ्य, ख्रिस्ताच्या सुवार्तेंत देवाचा सेवक, याला यासाठीं पाठविलें कीं त्यानें तुम्हांस स्थिर करावें, आणि तुमच्या विश्वासाच्या वृद्धीसाठीं बोध करावा; ३ तो असा कीं या संकटांत कोणीं घाबरूं नये; कारण आपण यासाठींच नेमलेले आहों; हें तुम्ही स्वतः जाणून आहां. ४ कारण आम्ही तुम्हांजवळ होतों तेव्हां आम्हीं तुम्हांस सांगून ठेविलें कीं आपणांस संकटें भोगावयाचीं आहेत; त्याप्रमाणें घडलेंहि, हें तुम्हांला कळलें आहे. ५ यामुळें मलाहि आणखी दम धरवेना, म्हणून मीं तुमच्या विश्वासासंबंधानें विचारपूस करण्यास पाठविलें; कोण जाणे, मोहविणाऱ्यानें तुम्हांस भूल घातल्यानें आमचे श्रम व्यर्थ झाले असतील. ६ आतां तीमथ्यानें तुम्हांपासून आम्हांकडे येऊन, तुमचा विश्वास व प्रीति यांविषयीं, आणि जसे आम्ही तुम्हांस भेटावयास उत्कंठित आहों तसे तुम्हीहि आम्हांस भेटावयास उत्कंठित असून आमची नेहमीं चांगली आठवण करितां, याविषयींचें सुवर्तमान आम्हांस कळविलें; ७ यामुळें बंधूंनो, आम्हांला आपल्या सर्व अडचणींत व संकटांत तुमच्या विश्वासावरून तुम्हांविषयीं समाधान मिळालें; ८ कारण जर तुम्ही प्रभूमध्यें स्थिर आहां तर आमच्या ठायीं जीव आहे. ९ आम्ही आपल्या देवासमोर तुम्हांमुळें ज्या सर्व आनंदानें आनंदित आहों त्याबद्दल आमच्यानें तुमच्यासंबंधानें देवाचें किती उपकारस्मरण करवेल? १० आम्ही रात्रंदिवस अतिशय प्रार्थना करितों कीं आम्हीं तुमचें तोंड पाहावें आणि तुमच्या विश्वासांतील न्यूनता पूर्ण करावी.

११ आतां देव, आपला पिता हा, व आपला प्रभु येशू हा, स्वतः आमचें तुम्हांकडे येणें निर्विघ्न करो; १२ आणि जशी आमची प्रीति तुम्हांवर आहे, तशी प्रभु तुमची प्रीति एकमेकांवर व सर्वांवर वाढवून विपुल करो; १३ यासाठीं कीं आपला प्रभु येशू आपल्या सर्व पवित्र जनांसहित येईल त्या वेळेस तुमचीं अंतःकरणें देव आपला पिता याच्यासमोर पवित्रतेंत निर्दोष होण्यास त्यानें तीं स्थिर करावीं.
[आमेन.]

### व्यावहारिक सदुपदेश

४ १ बंधुजनहो, शेवटीं आम्ही तुम्हांस विनंति करितों व प्रभु येशूमध्यें बोध करितों कीं तुम्हीं कसें चालून देवाला संतोषवावें हें तुम्हीं आम्हांपासून ऐकून घेतलें व त्याप्रमाणें चालत आहां, त्यांत तुमची उत्तरोत्तर वृद्धि व्हावी. २ प्रभु येशूच्या वतीनें कोणकोणत्या आज्ञा आम्हीं तुम्हांस दिल्या त्या तुम्हांस ठाऊक आहेत. ३ देवाची इच्छा ही आहे कीं तुमचें पवित्रीकरण व्हावें. तुम्हीं जारकर्मापासून स्वतःस दूर राखावें; ४, ५ 'देवाला न ओळखणाऱ्या' विदेशी लोकांप्रमाणें कामवासनेनें नव्हे, तर पवित्रतेनें व अब्रूनें तुम्हांतील प्रत्येकानें आपलें पात्र[१] कसें राखावें तें समजून घ्यावें. ६ कोणीं या गोष्टीचें उल्लंघन करून आपल्या बंधूला फसवूं नये; कारण प्रभु ह्या सर्व गोष्टींचा सूड घेणारा आहे, हें आम्हीं तुम्हांस अगाऊ सांगितलें होतें व साक्ष पटविली होती. ७ देवानें आपल्याला अशुद्धपणासाठीं पाचारण केलें नाहीं, तर पवित्रतेसाठीं पाचारिलें आहे. ८ तर ह्याचा अव्हेर कर-

---

१ अथवा: आपणासाठीं बायको करण्याचें समजून घ्यावें.

णारा तो मनुष्याचा नव्हे, तर तुम्हांस 'आपला पवित्र आत्मा देणारा' देव त्याचा अव्हेर करितो, असें होतें.
९ बंधुप्रीतीविषयीं आम्हीं तुम्हांस लिहावें याची तुम्हांस गरज नाहीं; कारण एकमेकांवर प्रीति करावी, असें तुम्हांला देवानेंच शिकविलें आहे; १० आणि सगळ्या मासेदोनियांतील सर्व बंधुवर्गावर तुम्ही ती करीतच आहां. तरी बंधूंनो, आम्ही तुम्हांस बोध करितों कीं ती उत्तरोत्तर अधिक करावी. ११,१२ बाहेरल्या लोकांबरोबर सभ्यतेनें वागावें; आणि तुम्हांस कशाचीहि गरज पडूं नये म्हणून, आम्हीं तुम्हांस आज्ञा केल्याप्रमाणें स्वस्थ राहणें, आपापला कारभार करणें, आणि आपल्या हातांनीं काम करणें, यांची हौस तुम्हांस असावी.

## मृतांची स्थिति

१३ बंधुजनहो, महानिद्रा पावलेल्या जनांविषयीं तुम्हीं अजाण नसावें अशी आमची इच्छा आहे, यासाठीं कीं ज्यांस आशा नाहीं अशा बाकीच्या लोकांसारिखा तुम्हीं खेद करूं नये. १४ येशू मरण पावला व उठला, असा जर आपला विश्वास आहे तर त्याप्रमाणें येशूच्याद्वारें जे महानिद्रा पावले आहेत त्यांस देव त्याजबरोबर आणील. १५ प्रभूच्या वचनावरून आम्ही हें तुम्हांस सांगतों कीं प्रभूचें येणें होईपर्यंत जे आपण जीवंत असे राहूं ते आपणांस महानिद्रा पावलेल्यांच्या आघाडीस जाववणार नाहीं. १६ कारण, प्रभु स्वतः आद्यदिव्यदूताची वाणी व देवाच्या तुतारीचा आज्ञाध्वनि होत असतां स्वर्गांतून उतरेल; आणि ख्रिस्तामध्यें जे मेलेले आहेत ते पहिल्यानें उठतील; १७ मग जीवंत उरलेले आपण त्यांजबरोबर प्रभूला सामोरे होण्यासाठीं मेघारूढ असे अंतराळांत घेतले जाऊं, आणि तसेंच सर्वदा प्रभूजवळ राहूं. १८ यास्तव या वचनांनीं एकमेकांचें समाधान करा.

## प्रभूचें आगमन व जागृतीची आवश्यकता

५ १ बंधूंनो, काळ व प्रसंग यांविषयीं तुम्हांस कांहीं लिहिण्याची गरज नाहीं. २ कारण तुम्हांला स्वतः पूर्णपणें माहीत आहे कीं जसा रात्रीं चोर, तसा प्रभूचा दिवस येतो. ३ शांति आहे, निर्भय आहे, असें ते म्हणतात तेव्हां गरोदर स्त्रीच्या वेदनांप्रमाणें त्यांजवर अकस्मात् नाश येतो; आणि ते निभावणारच नाहींत. ४ बंधुजनहो, त्या दिवसानें चोरासारिखें तुम्हांस गांठावें असें तुम्हीं अंधारांत नाहीं. ५ कारण तुम्ही सर्व प्रकाशाचे पुत्र व दिवसाचे पुत्र आहां; आपण रात्रीचे व अंधाराचे नाहीं; ६ यावरून आपण इतरांसारिखी झोप घेऊं नये, तर जागे व सावध राहावें. ७ झोप घेणारे रात्रीं झोप घेतात, आणि झिंगणारे रात्रीचे झिंगतात; ८ परंतु जे आपण दिवसाचे आहों त्या आपण सावध असावें; विश्वास व प्रीति हें उरस्त्राण व तारणाची आशा हें शिरस्त्राण घालावें; ९ कारण आपल्यावर क्रोध होण्यासाठीं नव्हे, तर आपला प्रभु येशू ख्रिस्त याच्या द्वारें आपलें तारण व्हावें त्यासाठीं देवानें आपल्याला नेमिलें आहे. १० तो आपणांसाठीं मरण पावला, यासाठीं कीं आपण जागे असलों किंवा निजलेले असलों तरी आपण त्याजबरोबर जीवंत असावें; ११ यास्तव तुम्ही एकमेकांस बोध करा, व एकमेकांची वृद्धि करा; असें तुम्ही करीतच आहां.

## निरनिराळे सद्बोध व समाप्ति

१२ बंधुजनहो, आम्ही तुम्हांस विनंति करितों कीं तुम्हांमध्यें जे श्रम करितात, प्रभूमध्यें तुम्हांवर असतात व तुम्हांस बोध करितात त्यांचा तुम्हीं मान करावा; १३ आणि त्यांच्या कामामुळें त्यांस प्रेमानें अत्यंत मान द्यावा. तुम्ही आपसांत शांत असा. १४ बंधूंनो, आम्ही तुम्हांस बोध करितों कीं अव्यवस्थित लोकांस ताकीद द्या, जे अल्पधीराचे आहेत त्यांस धीर द्या, अशक्तांस आधार द्या, सर्वांबरोबर सहनशीलतेनें वागा. १५ कोणीं कोणाचें वाइटाबद्दल वाईट करूं नये म्हणून जपा, आणि सर्वदा एकमेकांचें व सर्वांचें चांगलें करीत असा. १६ सर्वदा आनंदित असा; १७ निरंतर प्रार्थना करा; १८ सर्व स्थितींत उपकारस्मरण करा; कारण तुम्हांविषयीं ख्रिस्त येशूमध्यें देवाची इच्छा हीच आहे. १९ आत्म्याला विझवूं नका; २० संदेशांचा धिक्कार करूं नका; २१ सर्व गोष्टींची पारख करा; चांगलें तें बळकट धरा; २२ 'वाइटाच्या प्रत्येक प्रकारापासून दूर राहा.'
२३ शांतीचा देव स्वतः तुम्हांस परिपूर्णपणें पवित्र

करो; आणि आपला प्रभु येशू ख्रिस्त याच्या आगमनसमयीं तुमचा आत्मा, जीव व शरीर हीं निर्दोष अशीं यथासांग राखलीं जावोत. २४ तुम्हांस पाचारण करणारा विश्वासू आहे; तो हें करीलच.

२५ बंधूंनो, आम्हांसाठीं प्रार्थना करा.

२६ पवित्र चुंबनानें सर्व बंधुवर्गास सलाम करा. २७ मी तुम्हांस प्रभूची शपथ घालून सांगतों कीं हें पत्र सर्व बंधूंना वाचून दाखवावें.

२८ आपला प्रभु येशू ख्रिस्त याची कृपा तुम्हांबरोबर असो.

# पौलाचें थेस्सलनीकाकरांस दुसरें पत्र



### नमस्कार व ईशोपकारस्मरण

१ देव आपला पिता व प्रभु येशू ख्रिस्त यांतील
1 थेस्सलनीकाकरांच्या मंडळीला पौल, सिल्वान व
तीमथ्य यांजकडून : २ देवपिता व प्रभु येशू ख्रिस्त
यांजपासून तुम्हांस कृपा व शांति असो.
३ बंधूंनो, आम्हीं सर्वदा तुम्हांविषयीं देवाचें उपकार-
स्मरण केलें पाहिजे आणि हें योग्यच आहे; कारण तुमचा
विश्वास अतिशय वाढत आहे, आणि तुम्हां सर्वांतील
प्रत्येकाची एकमेकांवरील प्रीति विपुल होत आहे; ४
यावरून तुमचे सर्व छळ व जीं संकटें तुम्ही भोगीत
आहांत त्यांविषयींची तुमची सहनता व विश्वास यांबद्दल
देवाच्या मंडळ्यांत आम्हीहि तुम्हांविषयीं अभिमान
बाळगितों. ५ हें देवाच्या यथार्थ न्यायाचें प्रदर्शक आहे;
तो न्याय हा कीं ज्यासाठीं तुम्ही दुःख सोसीत आहां
त्या देवाच्या राज्याला योग्य असें तुम्ही मोजले जावें.
६ तुम्हांवर संकट आणणाऱ्या लोकांवर उलट संकट
आणणें आणि संकट सोसणाऱ्या तुम्हांस आम्हांबरोबर
विश्रांति देणें, हें अर देवाला न्याय्य आहे, ७ तर तें,
प्रभु येशू आपल्या सामर्थ्याच्या दूतांसह स्वर्गांतून 'अग्नि-
ज्वालावेष्टित ' असा प्रकट होण्याच्या समयीं होईल; ८
तेव्हां ' जे देवाला ओळखत नाहींत ' व आपल्या प्रभु
येशूची सुवार्ता ' मानीत नाहींत त्यांचा तो सूड उगवील; '
९, १० तो ' आपल्या पवित्र जनांत गौरव मिळविण्या-
करितां, ' आणि ' त्या दिवशीं ' विश्वास ठेवणाऱ्या
सर्वांच्या ठायीं ' आश्चर्यपात्र होण्याकरितां येईल, ' ( कारण
आम्हीं दिलेल्या साक्षीवर तुम्हीं विश्वास ठेविला आहे, )
तेव्हां ते ' प्रभूच्या समोरून व त्याच्या सामर्थ्याच्या
गौरवापासून ' दूर होऊन युगानुयुगाचा नाश हा दंड
त्यांना मिळेल. ११ याकरितां आम्ही तुम्हांसाठीं सर्वदा
अशी प्रार्थना करितों कीं आपल्या देवानें तुम्हांस
झालेल्या ह्या पाचारणाला योग्य असें मानावें आणि
चांगुलपणाविषयींचा तुमचा सर्व मनोदय व विश्वा-
साचें कार्य सामर्थ्यानें पूर्ण करावें; १२ यासाठीं
कीं आपला देव व प्रभु येशू ख्रिस्त यांच्या कृपेनें
आपला प्रभु येशू ' याच्या नामाला तुम्हांमध्यें, ' व तुम्हांला
' त्याच्या ठायीं, गौरव मिळावें. '

### प्रभूच्या पुनरागमनासंबंधीं असलेल्या चुकीच्या कल्पना

१ बंधुजनहो, आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताचें
2 आगमन व त्याच्याजवळ आपलें एकत्र होणें यां-
संबंधानें आम्ही तुम्हांस अशी विनंति करतों कीं,
२ तुम्ही एकाएकीं दचकून चित्तस्थैर्य सोडूं नका व
घाबरूं नका; प्रभूचा दिवस येऊन ठेपला आहे असें
सांगणाऱ्या आत्म्यानें, किंवा जणूं काय आम्हांकडून
आलेल्या वचनानें अगर पत्रानें घाबरूं नका; ३ कोण-
त्याहि प्रकारें कोणाकडून फसूं नका; त्या दिवसाच्या
अगोदर धर्मत्याग होऊन पापपुरुष प्रकट होईल; ४
तो नाशपुत्र, विरोधी, व ज्याला देव किंवा भजनीय

म्हणून म्हणतात त्या सर्वांपेक्षां स्वतःला उंच करणारा,
म्हणजे मी देव आहें, असें स्वतःचें प्रदर्शन करीत
देवाच्या मंदिरांत बसणारा असा आहे, ५ मी तुम्हांजवळ
असतांना हें तुम्हांस सांगितलें याची तुम्हांस
आठवण नाहीं काय? ६ त्यानें स्वसमयींच प्रकट
व्हावें, अन्य वेळीं होऊं नये, म्हणून जें प्रतिबंधक
आहे तें तुम्हांस ठाऊक आहे. ७ अधर्माचें
गूज आतांच आपलें कार्य चालवीत आहे, आणि जो
आतां प्रतिबंध करीत आहे तो दूर होईपर्यंत मात्र तें
तसेंच आपलें कार्य चालवीत जाईल; ८ आणि मग 'तो
अधर्मी' पुरुष प्रकट होईल, त्याला प्रभु येशू 'आपल्या
मुखांतील श्वासानें मारून टाकील,' आणि आपण येतांच
स्वदर्शनानेंच त्याला नाहींसें करील; ९, १० ज्यांचा नाश
होणार त्यांनीं आपलें तारण साधावें म्हणून सत्याची
आवड धरिली नाहीं; त्यांच्यासाठीं सैतानाच्या कृतीप्रमाणें
सर्व प्रकारचीं खोटीं महत्कृत्यें, चिन्हें, अद्भुतें आणि सर्व
प्रकारचें अनीतिजनक कपट यांनीं युक्त असें त्याचें येणें
होईल. ११ त्यांनीं असत्यावर विश्वास ठेवावा एतदर्थ
देव त्यांच्या ठायीं भ्रांतीचें कार्य चालेल असें करितो; १२
ज्यांनीं सत्यावर विश्वास ठेविला नाहीं, तर अनीतींत
संतोष मानिला त्या सर्वांस दंडाज्ञा व्हावी म्हणून
असें होईल.

### आणखी ईशोपकारस्मरण व प्रार्थना

१३ बंधुजनहो, 'प्रभूच्या प्रियजनांनो,' तुम्हांविषयीं
आम्हांला देवाचें उपकारस्मरण नेहमीं केलें पाहिजे; कारण
आध्यात्मिकरीत्या झालेल्या पवित्रीकरणांत व सत्यावरच्या
विश्वासांत देवानें तुम्हांस प्रारंभापासून तारणासाठीं
निवडिलें आहे; १४ त्यांत त्यानें तुम्हांस आमच्या
सुवार्तेच्या द्वारें आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताचें गौरव प्राप्त
करून घेण्यासाठीं पाचारण केलें आहे. १५ तर मग
बंधूंनो, स्थिर राहा, आणि तोंडीं किंवा आमच्या पत्रद्वारें
जे विधि तुम्हांस शिकविले ते बळकट धरून राहा.

१६ आपला प्रभु येशू ख्रिस्त हा, आणि ज्यानें
आपल्यावर प्रीति करून युगानुयुगाचें सांत्वन व चांगली
आशा कृपेनें दिली तो देव आपला पिता, १७ तुमच्या
मनाचें सांत्वन करो, आणि प्रत्येक चांगल्या करण्यांत व
बोलण्यांत तुम्हांस स्थिर करो.

### शेवटचा सद्बोध व समाप्ति

३ १ बंधुजनहो, आतां इतकेंच सांगणें आहे कीं
आम्हांसाठीं प्रार्थना करा; यासाठीं कीं प्रभूच्या
वचनाची त्वरेनें प्रगति व्हावी; जसें तुम्हांमध्यें
तसें सर्वत्रहि त्याचें गौरव व्हावें. २ आणि
आम्हीं वावग्या व दुष्ट मनुष्यांपासून सुटावें;
कारण सर्वांच्या ठायीं विश्वास आहे असें नाहीं. ३ प्रभु
विश्वासू आहे, तो तुम्हांस स्थिर करील, व दुष्टापासून
राखील. ४ तुम्हांविषयीं प्रभूमध्यें आमचा असा भरवसा
आहे कीं आम्ही तुम्हांस जें सांगतों तें तुम्ही करितां व
पुढेंहि कराल. ५ प्रभूनें तुमचीं मनें देवावरच्या प्रीतींत
व ख्रिस्ताच्या सहनतेंत मार्गी लावावीं.

६ बंधुजनहो, आम्ही आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या
नामानें तुम्हांस आज्ञा करितों कीं अव्यवस्थितपणें वाग-
णाऱ्या व आम्हांपासून मिळवून घेतलेल्या विधीप्रमाणें न
चालणाऱ्या प्रत्येक बंधूपासून तुम्हीं दूर व्हावें. ७ आमचें
अनुकरण कोणत्या रीतीनें केलें पाहिजे हें तुम्हां स्वतःला
ठाऊक आहे; आम्ही तुम्हांमध्यें अव्यवस्थितपणें वागलों
नाहीं; ८ आणि आम्हीं कोणाचें अन्न फुकट खाल्लें नाहीं;
तुम्हांतील कोणावर भार घालूं नये म्हणून आम्ही श्रमानें
व कष्टानें रात्रंदिवस काम केलें. ९ आम्हांस अधिकार नाहीं
असें मात्र म्हणणें नाहीं, तर आमचें अनुकरण करण्यास
आम्हीं आमचा कित्ता तुम्हांस द्यावा म्हणून असें केलें.
१० आम्ही तुम्हांजवळ होतों तेव्हांहि, कोणाला काम
करण्याची इच्छा नसली तर त्यानें खाऊंहि नये, अशी
तुम्हांस आज्ञा केली. ११ तरी तुमच्यामध्यें कित्येक
अव्यवस्थितपणानें वागणारे, कांहींएक काम न करणारे व
लुडबुड्ये आहेत, असें ऐकतों. १२ अशा लोकांना आम्ही
प्रभु येशू ख्रिस्ताच्या नामानें आज्ञा व बोध करितों कीं
त्यांनीं स्वस्थपणें काम करून आपलेंच अन्न खावें. १३
तुम्ही तर बंधूंनो, सुकृति करण्यांत थकूं नका. १४ या
पत्रांतील आमचें वचन जर कोणी मानीत नसला तर त्या

मनुष्याला पाहून ठेवा आणि त्याला लाज वाटावी म्हणून
त्याची सोबत धरूं नका, १५ तरी त्याला शत्रूप्रमाणें समजूं
नका. तर त्याला बंधुप्रमाणें बोध करा.
१६ शांतीचा प्रभु हा सर्वकाळ सर्व प्रकारें तुम्हांस
शांति देवो. प्रभु तुम्हां सर्वांबरोबर असो.
१७ मीं पौलानें स्वहस्तें लिहिलेला सलाम; ही प्रत्येक
पत्रांत खूण आहे, हें माझें अक्षर आहे. १८ आपला प्रभु
येशू ख्रिस्त याची कृपा तुम्हां सर्वांबरोबर असो.

---

# पौलाचें तीमथ्याला पहिलें पत्र



### नमस्कार व खोट्या शिक्षणासंबंधानें इशारा

१ १ देव आपला तारणारा व ख्रिस्त येशू आपली
आशा यांच्या आज्ञेनें ख्रिस्त येशूचा प्रेषित पौल याज-
कडून : माझा खरा विश्वासपुत्र तीमथ्य याला २ देव-
पिता व ख्रिस्त येशू आपला प्रभु यांजपासून कृपा, दया व
शांति असो.
३ मीं मासेदोनियास जातांना तुला इफिसांत राहावयाची
विनंति केली; त्या वेळीं, तूं कित्येक लोकांना ताकीद
द्यावी कीं, अन्य शिक्षण देऊं नका, ४ आणि जी ईश्वरी
व्यवस्था विश्वासाच्या द्वारें आहे तिच्या उपयोगी न
पडणाऱ्या, पण वाद मात्र उत्पन्न करणाऱ्या कहाण्यांकडे
व अनंत वंशावळ्यांकडे लक्ष देऊं नका असें मीं तुला
सांगितलें होतें, तें आतांहि सांगतों. ५ शुद्ध अंतःकरणांतील
चांगल्या विवेकभावनांतील व निष्कपट विश्वासांतील प्रीति
असणें हा आज्ञेचा हेतु आहे; ६ यांस सोडून कितीएक
लोक व्यर्थ बोलण्याकडे वळले आहेत; ७ ते नियम-
शास्त्राचे शिक्षक होऊं पाहतात, परंतु ते काय बोलतात
तें व ज्याविषयीं ते खातरीनें सांगतात तें त्यांस समजत
नाहीं. ८ नियमशास्त्राचा जर कोणी यथार्थ उपयोग करील
तर तें चांगलें आहे, हें आपल्याला कळतें; ९ तोहि हें
समजतो कीं नियमशास्त्र धार्मिकासाठीं केलेलें नाहीं, तर
अधर्मी व अनिवार, भक्तिहीन व पापी, अपवित्र व
अमंगळ, बापाला ठार मारणारे व आईला ठार मारणारे,
मनुष्यहत्या करणारे, १० जारकर्मी, पुंमैथुनी, गुलामांचा
व्यापार करणारे, लबाड, खोटी शपथ वाहणारे यांजसाठीं,
आणि जें कांहीं सुशिक्षणाविरुद्ध आहे त्याजसाठीं केलेलें
आहे; ११ धन्यवादित देवाच्या गौरवाची जी सुवार्ता
मला सोपलेली आहे तिला हें अनुसरून आहे.

### देवकृपेबद्दल पौलानें दाखविलेली कृतज्ञता

१२ ज्यानें मला शक्ति दिली त्या आपल्या प्रभु ख्रिस्त
येशूचे मी आभार मानितों; १३ कारण मी जो पूर्वी
निंदक, छळ करणारा व उपद्रव देणारा होतों त्या मला
त्यानें विश्वासू मानून आपल्या सेवेकरितां ठेविलें; मी
असा होतों तरी अविश्वासामुळें न समजून तें केलें,
म्हणून मजवर दया झाली; १४ ख्रिस्त येशूमधील विश्वास
व प्रीति यांसह आपल्या प्रभूची कृपा विपुल झाली.
१५ ख्रिस्त येशू पापी जनांना तारावयास जगांत आला,
हें वचन विश्वसनीय व सर्वथा स्वीकारावयास योग्य आहे;
त्या पापी लोकांपैकीं मी मुख्य आहें. १६ तरी जे युगानु-
युगाच्या जीवनासाठीं त्याजवर विश्वास ठेवणार, त्यांस
उदाहरण व्हावें म्हणून येशू ख्रिस्तानें, मी जो मुख्य त्या
मजविषयीं आपली सर्व सहनशीलता दाखवावी एतदर्थ,
मजवर दया झाली. १७ जो सनातन राजा, अविनाशी,
अदृश्य, असा एकच देव, त्याला सन्मान व गौरव युगानु-
युग असो. आमेन.
१८ माझ्या पुत्रा तीमथ्या, तुजविषयीं पूर्वीच झालेल्या
संदेशाप्रमाणें ही आज्ञा मी तुला सांगून ठेवितों कीं तूं
त्यांच्या द्वारेंच सुयुद्ध कर; १९ विश्वास व चांगला विवेक-
भाव धर; कित्येकांनीं हा झुगारून दिल्यामुळें त्यांचें
विश्वासरूपी तारूं फुटलें; २० त्यांत हुमनाय व आलेक्सांद्र

हे आहेत; त्यांस मीं सैतानाच्या स्वाधीन केलें आहे, यासाठीं कीं त्यांनीं निंदा करण्याचें सोडून देण्यास शिकावें.

## सार्वजनिक उपासनेबाबत सूचना

२ १ तर सर्वांत प्रथम हा बोध मी करितों कीं सर्व मनुष्यांसाठीं विनंत्या, प्रार्थना, रदबदल्या व ईशोपकारस्मरण करावें; २ राजाकरितां व सर्व वरिष्ठ अधिकाऱ्यांकरितां करावें यासाठीं कीं आपण सर्व सुभक्तीनें व गंभीरपणानें शांतीचें व स्वस्थपणाचें असें आयुष्यक्रमण करावें. ३ हें आपला तारणारा देव याच्या दृष्टीनें चांगलें व स्वीकारावयास योग्य आहे. ४ त्याची इच्छा आहे कीं सर्व मनुष्यांचें तारण व्हावें व त्यांनीं सत्याच्या पूर्ण ज्ञानास पोहंचावें. ५ कारण एकच देव आहे, आणि देव व मनुष्यें यांमधील ख्रिस्त येशू हा मनुष्य एकच मध्यस्थ आहे. ६ त्यानें सर्वांसाठीं मुक्तीचें मोल म्हणून स्वतःला दिलें ह्याची साक्ष यथाकालीं देणें आहे; ७ या साक्षीसाठीं मला घोषणा करणारा व प्रेषित, (मी सत्य बोलतों, लबाडी करीत नाहीं,) विश्वास व सत्य ह्यांसंबंधीं विदेशी लोकांचा शिक्षक असें नेमिलें.

८ माझी इच्छा अशी आहे कीं प्रत्येक ठिकाणीं पुरुषांनीं राग व विवाद ह्यांचा स्पर्श होऊं न देतां पवित्र हस्त उंच करून प्रार्थना करावी. ९ तशीच माझी इच्छा आहे कीं स्त्रियांनीं स्वतःस साजेल अशा वेषानें आपणांस भिडस्तपणानें व मर्यादेनें शोभवावें; केस गुंफणें आणि सोनें, मोत्यें व मोलवान् वस्त्रें यांनीं नव्हे, १० तर सत्कर्मांनीं शोभवावें; (देवभक्ति स्वीकारलेल्या स्त्रियांस हें शोभतें). ११ स्त्रीनें पूर्ण अधीनतेनें स्वस्थतेंत शिकावें. १२ स्त्रीला शिकविण्याची आणि पुरुषावर धनीपण चालविण्याची परवानगी मी देत नाहीं; तिनें स्वस्थ राहावें. १३ कारण प्रथम आदाम घडला, नंतर हव्वा. १४ आदाम भुलवला गेला नाहीं, स्त्री भुलून अपराधांत सांपडली. १५ तथापि ती मर्यादेनें विश्वास, प्रीति व पवित्रता यांत राहिल्यास मुलांना जन्म देण्याच्या योगें तिचें तारण होईल.

## ख्रिस्ती मंडळीचे कामदार

३ १ कोणी अध्यक्ष होण्यास पाहतो तर तो चांगल्या कामाची इच्छा धरितो, हें वचन विश्वसनीय आहे. २ अध्यक्ष अदूष्य, एका स्त्रीचा पति, नेमस्त, स्वस्थचित्त, शिष्ट, अतिथिप्रिय, सुशिक्षक असा असावा. ३ तो मद्यपी व मारका नसावा; तर सौम्य, भांडण न करणारा, द्रव्यलोभ न धरणारा, ४ आपल्या घरची व्यवस्था चांगली ठेवणारा, आपल्या मुलांबाळांना भीडमर्यादेचें वळण लावून स्वाधीन ठेवणारा असा असावा; ५ ज्याला आपल्या घरची व्यवस्था चांगली ठेवतां येत नाहीं, तो देवाच्या मंडळीचा संभाळ कसा करील? ६ त्यानें मदांध होऊन सैतानाच्या दंडांत पडूं नये म्हणून तो नवशिका नसावा. ७ त्याची निंदा होऊं नये व त्यानें सैतानाच्या पाशांत सांपडूं नये म्हणून त्यानें बाहेरल्या लोकांपासूनहि चांगलें नांव मिळविलेलें असावें. ८ तसेंच सेवकहि गंभीर असावे; दुबोल्ये, मद्यपानासक्त व पैसा खाणारे नसावे; ९ विश्वासाचें गूज शुद्ध विवेकानें राखणारे असावे. १० त्यांचीहि पूर्वी परीक्षा व्हावी; आणि अदूष्य ठरल्यास त्यांनीं सेवकपण करावें. ११ तसेंच, स्त्रिया गंभीर असाव्या, चहाड नसाव्या, नेमस्त व सर्व गोष्टींविषयीं विश्वासू असाव्या. १२ सेवक एका स्त्रीचा पति असावा; ते आपल्या मुलांबाळांची व घरची व्यवस्था चांगली ठेवणारे असावे. १३ कारण ज्यांनीं सेवकपण चांगलें चालविलें ते आपणांस चांगली योग्यता आणि ख्रिस्त येशूवरील विश्वासांत फार धैर्य मिळवितात.

१४ तुजकडे लवकरच येण्याची आशा धरून हें तुला लिहिलें; १५ तरी पण मला उशीर लागल्यास ज्या सदाजीवी देवाची मंडळी, सत्याचा स्तंभ व पाया अशी आहे, त्या देवाच्या घरांत कसें वर्तलें पाहिजे, हें तुला समजावें. १६ सुभक्तीचें गूज निर्विवाद मोठें आहे:

तो देहानें प्रकट झाला,
आत्म्यानें नीतिमान् ठरला,
देवदूतांच्या दृष्टीस पडला,
त्याची राष्ट्रांत घोषणा झाली,

१ मुळांत: एपिस्कोप. २ मुळांत: डायकोन.

जगांत त्याजवर विश्वास ठेवण्यांत आला.
तो गौरवांत वर घेतला गेला.

### खोटें शिक्षण देणाऱ्यांशीं कशी वागणूक करावी

१ आत्मा स्पष्ट म्हणतो कीं पुढील काळीं विश्वासा-
४ पासून कित्येक लोक भ्रष्ट होतील, लबाड बोलणाऱ्या
मनुष्यांच्या ढोंगानें ते फुसलाविणाऱ्या आत्म्यांच्या
व भूतांच्या शिक्षणाच्या नादीं लागतील; २ त्या मनुष्यांचा
सद्सद्विवेक डागलेला असा होईल; ३ लग्न करावयाला ते
मना करतील, आणि विश्वास ठेवणारे व सत्य समजणारे
यांनीं ईशोपकारस्मरण करून ज्यांचा उपभोग घ्यावयाचा
अशीं देवानें उत्पन्न केलेलीं भक्ष्यें वर्ज करण्यास सांग-
तील. ४ देवानें उत्पन्न केलेली प्रत्येक वस्तु चांगली आहे,
आणि ईशोपकारस्मरण करून घेतलेलें कांहीं वर्ज्य नाहीं; ५
कारण देवाचें वचन व प्रार्थना ह्यांनीं तें शुद्ध होतें.

६ या गोष्टींची बंधुवर्गाला आठवण करून दे, म्हणजे
विश्वासाच्या वचनांनीं व ज्या सुशिक्षणाला तूं अनुसरलास
त्या वचनांनीं पोषण करून घेणारा असा तूं ख्रिस्त येशूचा
चांगला सेवक होशील. ७ अधर्मांच्या व आयाबायांच्या कहा-
ण्यांपासून दूर राहा; आणि सुभक्तीविषयीं कसरत कर;
८ कारण शारीरिक कसरत थोडीच उपयोगी आहे; सुभक्ति
तर सर्वांविषयीं उपयोगी आहे; तिला आतांच्या व पुढच्याहि
जीवनाची भाक मिळाली आहे. ९ हें वचन विश्वसनीय
व सर्वथा स्वीकारास योग्य आहे. १० याकरितां आम्ही
श्रम व खटपट करितों; कारण जो सर्व मनुष्यांचा व
विशेषेंकरून विश्वास ठेवणाऱ्यांचा तारणारा, त्या सदाजीवी
देवावर आम्हीं आशा ठेविली आहे.

### तीमथ्याचा खाजगी जीवनक्रम व शिक्षण

११ या गोष्टी आज्ञारूपानें सांगूं शिकीव. १२ कोणीं
तुझ्या तारुण्याला तुच्छ मानूं नये; तर भाषण, वर्तन,
प्रीति, विश्वास व शुद्धता यांविषयीं विश्वास ठेवणाऱ्या
लोकांचा कित्ता हो. १३ मी येईपर्यंत वाचन, बोध व
शिक्षण यांकडे लक्ष ठेव. १४ तुजवर वडीलवर्गानें हात
ठेवीत असतांना संदेशाच्या द्वारें दिलेलें असें जें कृपादान
तुझ्यामध्यें आहे त्याची उपेक्षा करूं नको. १५ तुझी प्रगति
सर्वांस दिसून यावी म्हणून तूं या गोष्टींचा अभ्यास ठेव;
यांत गढून जा. १६ आपणाकडे व आपल्या शिक्षणाकडे
नीट लक्ष ठेव; त्यांतच टिकून राहा; कारण असें केल्यानें
तूं स्वतःचें व तुझें ऐकणाऱ्यांचेंहि तारण करशील.

१ वडिलाला खडसून बोलूं नको, तर त्याला
५ बाप मानून बोध कर; २ तरुणांस बंधु मानून, वडील
स्त्रियांस माता मानून, तरुण स्त्रियांस बहिणी मानून
पूर्ण शुद्धतेनें बोध कर.

### ख्रिस्ती मंडळींतील विधवांचा परामर्ष

३ ज्या विधवा वास्तविक विधवा आहेत त्यांचा सन्मान
कर. ४ कोणा विधवेला मुलें किंवा नातवंडें असलीं तर
त्यांनीं प्रथम आपल्या घरच्यांबरोबर धर्मनिष्ठ वृत्तीनें वागून
आपल्या वडिलांचे उपकार फेडावयास शिकावें, कारण हें
देवाच्या दृष्टीनें मान्य आहे. ५ जी वास्तविक विधवा आहे
म्हणजे एकटी पडलेली आहे, तिनें आपली आशा देवावर
ठेविली आहे; आणि ती रात्रंदिवस विनवण्या व प्रार्थना
करीत राहते; ६ परंतु जी विधवा विलासी आहे, ती
जीवंत असून मेलेली आहे. ७ त्यांनीं अदूष्य व्हावें
म्हणून त्यांना याप्रमाणें वागण्याची आज्ञा कर. ८ जर
कोणी स्वकीयांची व विशेषेंकरून आपल्या घरच्यांची तर-
तूद करीत नाहीं, तर त्यानें विश्वास नाकारिला असें होतें,
तो इसम विश्वास न ठेवणाऱ्या इसमापेक्षां वाईट आहे. ९
जी साठ वर्षांच्या आंत नसून एकाच पतीची स्त्री झाली
असेल, १० जी चांगल्या कर्मांविषयीं नावाजलेली असेल
म्हणजे जिनें मुलांबाळांचा प्रतिपाळ केला असेल, पाहुण-
चार केला असेल, पवित्र जनांचे पाय धुतले असतील,
संकटांत पडलेल्या लोकांची गरज भागविली असेल, सर्व
प्रकारच्या चांगल्या कर्मांस अनुसरली असेल, अशी नावा-
जलेली विधवा यादींत मांडून घ्यावी. ११ तरुण विधवांस
घेऊं नये, कारण त्यांनीं कामुक होऊन ख्रिस्ताला सोडिल्या-
वर त्या लग्न करावयास पाहतात. १२ अशांस दंडाज्ञा
आहे, कारण त्यांनीं आपल्या पहिल्या प्रतिज्ञेचा भंग केला.
१३ शिवाय घरोघर फिरून त्या आळशी होतात; आणि
आळशी होतात इतकेंच नव्हे, तर वटवट्या व लुडबुड्या
होतात, आणि बोलूं नये तें बोलतात. १४ यास्तव माझी

१ मुळांत : प्रेस्बुतर

१ मुळांत : प्रेस्बुतर

इच्छा अशी आहे कीं तरुण विधवांनीं लग्न करावें, मुलें
प्रसवावीं, घर चालवावें आणि विरोध्याला निंदा करण्यास
निमित्त सांपडूं देऊं नये; १५ कित्येक तर आधींच बहकून
सैतानामागें जाऊन चुकल्या आहेत. १६ जर कोणा
विश्वास ठेवणाऱ्या स्त्रीच्या येथें विधवा असल्या तर तिनें
त्यांची तरतूद करावी, त्यांचा मंडळीवर भार पडूं देऊं
नये; म्हणजे ज्या खरोखर विधवा आहेत त्यांस मंडळीला
साहित्य पुरवितां येईल.

### वडील

१७ जे वडील अध्यक्षतेचें काम चांगलें चालवितात,
विशेषेंकरून जे उपदेश व शिक्षण ह्या बाबतींत श्रम घेतात
ते दुप्पट सन्मानास योग्य मोजिले जावे. १८ कारण
शास्त्र म्हणतें, ‘बैल मळणी करीत असतां त्याला मुसकें
बांधूं नको,’ आणि, ‘कामकरी आपल्या मजुरीस योग्य
आहे.’ १९ ‘दोन किंवा तीन साक्षीदार’ असल्या-
वांचून वडिलावरील आरोपाचा खटला घेऊं नको. २० इत-
रांस भय पडावें म्हणून पाप करणाऱ्यांस सर्वांसमक्ष दोष
लाव. २१ देव, ख्रिस्त येशू व निवडलेले देवदूत यांजसमोर
मी तुला निक्षून सांगतों कीं मनांत अढी न धरितां या
आज्ञा पाळ, पक्षपातानें कांहीं करूं नको. २२ उतावळीनें
कोणावर हात ठेवूं नको, आणि दुसऱ्यांच्या पापांचा
वांटेकरी होऊं नको; आपणाला शुद्ध राख. २३ यापुढें
नुसतें पाणीच पीत राहूं नको, तर आपल्या पोटासाठीं
आणि आपल्या वारंवार होणाऱ्या दुखण्यासाठीं थोडा
द्राक्षारस घे. २४ कित्येकांचीं पापें उघड असून, तीं त्यांज-
पुढें न्यायनिवाड्याकरितां जातात, आणि कित्येकांचीं
त्यांच्यामागून जातात. २५ त्याप्रमाणें उघड अशीं कांहीं
चांगलीं कृत्यें आहेत, आणि जीं दुसऱ्या प्रकारचीं आहेत
तींहि गुप्त राहूं शकत नाहींत.

### दास

१ जे दास म्हणून जुवाखालीं आहेत त्या सर्वांनीं
६ आपापले धनी सर्व प्रकारच्या सन्मानास योग्य
आहेत असें मानावें, यासाठीं कीं देवाच्या नामाची व
शिक्षणाची निंदा होऊं नये; २ आणि ज्यांस विश्वास
ठेवणारे धनी आहेत त्यांनीं हे बंधु आहेत म्हणून त्यांचा
अवमान करूं नये; तर अधिक सेवा करावी; कारण ज्यांस
सेवेचा लाभ होतो ते विश्वास ठेवणारे व प्रिय आहेत. या
गोष्टी शिकीव आणि यांविषयीं बोध कर.

### खोटें शिक्षण

३ जर कोणी अन्य तऱ्हेचें शिक्षण देतो आणि
आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताचीं जीं सुवचनें तीं, व सुभक्त्य-
नुसार जें शिक्षण तें, मान्य करीत नाहीं, ४ तर तो
मदांध आहे; त्यास कांहीं कळत नाहीं, तो वादविवाद व
शब्दयुद्ध यांमुळें वेडा बनला आहे; यांपासून हेवा, कलह,
अपशब्द, दुसऱ्यांविषयीं कुकल्पना हीं उत्पन्न होतात; ५
मन बिघडलेल्या, सत्यास मुकलेल्या, सुभक्ति ही कमाईचें
साधन आहे अशी कल्पना करणाऱ्या मनुष्यांचीं एकसारखीं
भांडणें होतात.

### खरीखुरी संपत्ति

६ संतोषसहित असलेली सुभक्ति तर मोठाच लाभ
आहे. ७ आपण जगांत कांहीं आणिलें नाहीं, आपल्या-
च्यानें त्यांतून कांहीं नेववत नाहीं; ८ आपल्याला अन्नवस्त्र
असल्यास तेवढ्यानें तृप्त असावें; ९ परंतु जे धनवान् होऊं
पाहतात ते परीक्षेंत, पाशांत आणि मनुष्यांस नाशांत व
विध्वंसांत बुडविणाऱ्या अशा मूर्खपणाच्या व बाधक वास-
नांत सांपडतात. १० कारण द्रव्याचा लोभ सर्व प्रकारच्या
वाइटाचें मूळ आहे; त्याच्या पाठीस लागून कित्येक
विश्वासापासून बहकले आहेत; आणि त्यांनीं स्वतःस फार
खेदांनीं ओसकून घेतलें आहे.

### सद्बोध

११ हे देवभक्ता, तूं यांपासून पळ, आणि नीतिमत्त्व,
सुभक्ति, विश्वास, प्रीति, धीर व सौम्यता यांच्या पाठीस
लाग. १२ विश्वासासंबंधींचें जें सुयुद्ध तें कर, युगानुयुगाचें
जीवन मिळीव, त्यासाठींच तुला पाचारण झालें आहे,
आणि तूं पुष्कळ साक्ष्यांसमोर तो सुस्वीकार करून मान्य
केला. १३ सर्वांस जीवन देणारा जो देव त्याजसमोर
आणि ज्या ख्रिस्त येशूनें पंतय पिलातासमक्ष तो सुस्वीकार
केला, त्याजसमोर मी तुला निक्षून सांगतों, १४ आपल्या
प्रभु येशू ख्रिस्त प्रकट होईपर्यंत तूं त्याची आज्ञा निष्कलंक

व अदूष्य राख. १५ जो धन्य व एकच अधिपति,
राजांचा राजा व प्रभूंचा प्रभु, ज्या एकालाच अमरत्व आहे,
जो अगम्य प्रकाशांत राहतो, ज्याला कोणा मनुष्यानें पाहिलें
नाहीं, १६ आणि कोणाच्यानें पाहवत नाहीं, तो तें त्याचें
प्रकट होणें यथाकाळीं दिसण्यांत आणील; त्याला सन्मान व
युगानुयुगाचें सामर्थ्य असो. आमेन.

१७ प्रस्तुत युगांतल्या धनवानांस सांग कीं तूं अभिमानी
होऊं नये, चंचल धनावर आशा ठेवूं नये, तर जो सदा-
जीवी देव आपल्यास उपभोगासाठीं सर्व कांहीं विपुल देतो
त्याजवर आशा ठेवावी; १८ चांगलें तें करावें, सत्कर्मां-
विषयीं धनवान् असावें; दानशील, परोपकारी असावें. १९
जें खरें जीवन तें मिळविण्यास पुढील काळीं चांगला
आधार होईल, असें साठवण आपणासाठीं करावें.

२० हे तीमथ्या, तुझ्या स्वाधीन केलेली ठेव संभाळ;
अधर्माच्या रिकाम्या वटवटी आणि जिला विद्या हें नांव
चुकीनें दिलें आहे तिचीं विरोधी मतें वर्ज कर; २१ तीं
स्वीकारून कितीएक विश्वासापासून चुकून गेले.

तुजबरोबर कृपा असो.

# पौलाचें तीमथ्याला दुसरें पत्र

### नमस्कार व ईशोपकारस्मरण

१ १ प्रिय पुत्र तीमथ्य याला, ख्रिस्त येशूमध्यें जें
जीवन आहे त्याविषयीं दिलेल्या वचनाप्रमाणें देवाच्या
इच्छेनें ख्रिस्त येशूचा प्रेषित पौल याजकडून; २ देव-
पिता व ख्रिस्त येशू आपला प्रभु यांजपासून कृपा, दया व
शांति असो.

३,४ मी आपल्या प्रार्थनांत रात्रंदिवस तुझें स्मरण
अखंड करितों आणि तुझे अश्रु मनांत आणून तुझ्या भेटीनें
मी आनंदभरित व्हावें म्हणून तुला भेटण्याची फार उत्कंठा
बाळगितों; तुझ्यामध्यें असलेल्या निष्कपट विश्वासाची मला
आठवण होऊन, ज्या देवाची आपल्या पूर्वजांपासून चालत
आलेली सेवा मी शुद्ध मनानें करितों, त्याचे मी आभार
मानितों. ५ तो विश्वास पहिल्यानें तुझी आजी लोईस
हिजमध्यें होता; तुझी आई युनीके हिजमध्यें होता; आणि
तोच तुजमध्यें आहे असा मला भरवसा आहे.

### आस्था व हिंमत धरावी म्हणून बोध

६ या कारणास्तव मी तुला आठवण देतों कीं देवाचें जें
कृपादान माझे हात तुजवर ठेविल्यानें तुझ्यामध्यें आहे तें
प्रदीप्त कर. ७ कारण देवानें आपल्याला भित्रेपणाचा नव्हे,
तर सामर्थ्याचा, प्रीतीचा व अनुशासनाचा आत्मा दिला
आहे, ८ यास्तव आपल्या प्रभूविषयींच्या साक्षीची आणि
मी जो त्याचा बंदिवान त्या माझी तूं लाज धरूं नये; तर
देवाच्या सामर्थ्याच्या परिमाणानें सुवार्तेसाठीं माझ्या-
बरोबर दुःख सोसावें. ९ त्यानें आपल्या कर्मांप्रमाणें नव्हे
तर स्वतःच्या संकल्पाप्रमाणें व कृपेप्रमाणें आपल्याला तारिलें
व पवित्र पाचारणानें पाचारिलें आहे; ही कृपा युगकालापूर्वी
ख्रिस्त येशूमध्यें आपल्यावर करण्यांत आली होती; १० ती
आतां आपला तारणारा ख्रिस्त येशू याच्या प्रकट होण्यानें
दृश्यमान झाली आहे; त्यानें मरण नाहींसें केलें, आणि सुवा-
र्तेच्या द्वारा जीवन व अविनाशिता हीं प्रकाशित केलीं आहेत;
११ मला त्या सुवार्तेचा घोषणा करणारा, प्रेषित व शिक्षक,
असें नेमलें होतें. १२ या कारणानें हीं दुःखें मी सोशीत
आहें; तरी मी लाजत नाहीं; कारण मीं कोणावर विश्वास
ठेविला आहे, हें मला ठाऊक आहे, आणि तो माझी ठेव
त्या दिवसासाठीं राखावयास शक्तिमान् आहे असा माझा
भरवसा आहे. १३ ज्या सुवचनांचा नमुना तूं मजपासून
ऐकून घेतला तो, ख्रिस्त येशूच्या ठायीं असलेला तुझा
विश्वास व प्रीति यांमध्यें दृढपणें राख. १४ आपल्यामध्यें
वस्ती करणाऱ्या पवित्र आत्म्याच्या योगें ती ठेव चांगली
संभाळ.

१५ जे आशियांत आहेत ते सर्व मजपासून फुटले, हें
तुला ठाऊकच आहे; त्यांत फुगल व हर्मगनेस हे आहेत.
१६ अनेसिफराच्या घरावर प्रभु दया करो, कारण त्यानें
वारंवार माझें समाधान केलें आणि त्याला माझ्या बेडीची
लाज वाटली नाहीं; १७ तर तो रोम एथें असतांना त्यानें श्रम
घेऊन मी सांपडेपर्यंत माझा शोध केला; १८ (त्या दिवशीं
त्याला प्रभूपासून दया मिळो, असें प्रभु करो;) आणि इफिसांत
किती प्रकारें त्यानें सेवा केली, हें तुला चांगलें माहीत आहे.

२ १ माझ्या मुला, ख्रिस्त येशूच्या ठायीं असलेली
जी कृपा तिच्यांत बळवान् होत जा. २ ज्या गोष्टी तूं
पुष्कळ साक्ष्यांसमोर मजपासून ऐकल्या त्या इतरांना
शिकविण्यास योग्य अशा विश्वासू मनुष्यांस सोंपून दे. ३
तूं ख्रिस्त येशूचा चांगला शिपाई आहेस म्हणून मजबरो-
बर दुःख सोस. ४ लढाई करणारा इसम संसाराच्या
कार्यांत गुंतत नाहीं; ज्यानें आपल्याला सैन्यांत घेतलें त्याला
संतोषवावें हा त्याचा हेतु असतो. ५ जर कोणी मल्लयुद्ध
करितो, तर तें नियमाप्रमाणें केल्यावांचून त्याला मुगूट
घालण्यांत येत नाहीं. ६ श्रम करणाऱ्या शेतकऱ्यानें पहि-
ल्यानें पिकाचा वांटा घेणें योग्य आहे. ७ जें मी बोलतों
तें समजून घे; प्रभु तुला सर्व गोष्टींची समज देईल. ८
मीं सांगितलेल्या सुवार्तेप्रमाणें मेलेल्यांतून उठविलेला,
दाविदाच्या संतानांतील येशू ख्रिस्त, याची आठवण ठेव.
९ त्या सुवार्तेमुळें मी दुष्कर्म करणाऱ्यासारिखा बेड्यांचें
देखील दुःख सोशीत आहें; तरी देवाच्या वचनाला बेडी
पडलेली नाहीं. १० यामुळें निवडलेल्या लोकांकरितां मी
सर्व कांहीं धीरानें सोशितों; ख्रिस्त येशूमध्यें जें तारण तें
त्यांसहि युगानुयुगाच्या गौरवासह प्राप्त व्हावें म्हणून. ११
हें वचन विश्वसनीय आहे कीं जर आपण त्याजबरोबर
मेलों तर त्याजबरोबर जीवंतहि राहूं. १२ जर आपण
धीरानें सोशितों, तर त्याजबरोबर राज्यहि करूं; आपण
त्याला नाकारूं तर तोहि आपल्याला नाकारील; १३ आपण
अविश्वासी झालों तरी तो विश्वासू राहतो; कारण त्याच्यानें
स्वतःविरुद्ध वागवत नाहीं.

### शब्दयुद्ध करूं नये म्हणून बोध

१४ तूं या गोष्टींची त्यांस आठवण दे; त्यांस प्रभू-
समोर निक्षून सांग कीं शब्दयुद्ध करूं नका; तें कशाच्याहि
उपयोगी न पडतां ऐकणाऱ्यांच्या नाशास कारण होतें. १५
तूं सत्याचें वचन नीट सांगणारा, लाज वाटण्यास कसलेंहि
कारण नसलेला कामकरी असा देवाला पटलेला, असा
स्वतःला सादर करण्यास होईल तितकें कर. १६ अध-
र्माच्या रिकाम्या वटवटींपासून दूर राहा; अशा वटवटी
करणारे अभक्तींत अधिक सरसावतील; १७ आणि त्यांचें
शिक्षण पुळीसारखें चरेल; त्यांच्यापैकीं हुमनाय व फिलेत
हे आहेत; १८ ते सत्याविषयीं चुकले आहेत; पुनरुत्थान
होऊन गेलें असें ते म्हणतात, आणि कित्येकांच्या विश्वा-
साचा नाश करितात. १९ तथापि देवानें घातलेला स्थिर
पाया टिकून राहतो, त्यावर, ‘प्रभु आपले जे आहेत त्यांस
ओळखतो,’ आणि ‘जो कोणी प्रभूचें नाम घेतो त्यानें
अनीतीपासून दूर राहावें,’ ही मुद्रा मारलेली आहे. २०
मोठ्या घरांत केवळ सोन्याचीं व रुप्याचीं पात्रें असतात
असें नाहीं, तर लाकडाचीं व मातीचींहि असतात; कांहींचा
मान होतो व कांहींचा अवमान होतो. २१ यास्तव जर
कोणी त्यांपासून दूर राहून स्वतःला शुद्ध केलें, तर तो पवित्र
केलेलें, व स्वामीला उपयोगी पडणारें, प्रत्येक चांगल्या
कामास तयार केलेलें, असें मानाचें पात्र होईल. २२ तरुण-
पणाच्या वासनांपासून दूर पळ आणि शुद्ध मनानें प्रभूचा
धावा करणाऱ्यांबरोबर नीतिमत्त्व, विश्वास, प्रीति, शांति
यांच्या पाठीस लाग. २३ मूर्खपणाच्या व अज्ञानाच्या
वादविषयांपासून दूर राहा, कारण त्यांपासून भांडणें उत्पन्न
होतात हें तुला ठाऊक आहे. २४ प्रभूच्या दासानें भांडूं
नये, तर त्यानें सर्वांबरोबर सौम्य, शिकविण्यास उत्सुक,
सहनशील, २५ विरोध करणाऱ्यांस सौम्यतेनें शिक्षण
देणारा, असें असावें; कदाचित् देव त्यांस सत्याचें ज्ञान
होण्यासाठीं पश्चात्तापी मन देईल, २६ आणि सैतानानें
आपल्या इच्छेस वश होण्याकरितां धरिलेले लोक त्याच्या
पाशांतून सुटून शुद्धीवर येतील.

### जवळ येऊन ठेपलेलीं संकटें

३ १ शेवटल्या काळीं कठीण दिवस येतील हें
समजून घे. २ कारण मनुष्यें स्वार्थी, धनलोभी,
बढाईखोर, गर्विष्ठ, निंदक, आईबापांस न मानणारीं,

कृतघ्न, अपवित्र, ३ ममताहीन, शांततांद्वेषी, चहाड, असंयमी, क्रूर, चांगल्यावर प्रेम न करणारीं, ४ विश्वास-घातकी, हूड, मदांध, देवावर प्रेम न करितां विषयावर प्रेम करणारीं, ५ सुभक्तीचें केवळ स्वरूप दाखवून स्वतःवर तिचा संस्कार नाहीं, अशीं तीं होतील; त्यांजपासूनहि दूर राहा. ६ जे लोक घरांत हळूच शिरून पापांनीं भारावलेल्या, नाना प्रकारच्या वासनांनीं बहकलेल्या, ७ सदा शिकत असूनहि सत्याच्या ज्ञानाला कधीं न पोहचणाऱ्या, अशा भोळ्या स्त्रियांस वश करितात त्यांपैकीं हे आहेत. ८ यान्नेस व यांब्रेस यांनीं जसें मोशाला अडविलें, तसें हेहि सत्याला अडवितात; हे भ्रष्टबुद्धि बनलेले व विश्वासासंबंधानें कसोटीस न उतरलेले असे आहेत. ९ तरी हे अधिक सरसावणार नाहींत; कारण जसें त्यांचें मूर्खपण उघड झालें, तसें ह्यांचेंहि सर्वांस उघड होईल.

### त्यांपासून तीमथ्यानें आपला बचाव कसा करावा

१० तूं माझें शिक्षण, आचार, संकल्प, विश्वास, सहनशीलता, प्रीति, धीर हीं ओळखून आहेस; ११ आणि अंत्युखियांत, इकुन्यांत व लुस्रांत जीं संकटें मजवर आलीं तीं सोसण्यांत व माझा जो छळ झाला तो सहन करण्यांत मला अनुसरलास; त्या सर्वांतून प्रभूनें मला सोडविलें. १२ जे ख्रिस्त येशूमध्यें सुभक्तीनें आयुष्य घालवावयास पाहतात त्या सर्वांचा छळ होईल; १३ आणि दुष्ट व भोंदू मनुष्यें हीं फसवून व स्वतः फसून दुष्टपणांत अधिक सरसावतील. १४ तूं ज्या गोष्टी शिकलास व ज्यांविषयीं तुझी खात्री झाली त्या धरून राहा. १५ त्या कोणापासून शिकलास हें, आणि तुला पवित्र शास्त्रांची माहिती बालपणापासून आहे हें, तुला ठाऊक आहे; तें ख्रिस्त येशूमधील तुझ्या विश्वासाच्या द्वारें तारणासाठीं तुला ज्ञानी करावयास समर्थ आहे. १६ प्रत्येक ईश्वरप्रेरित शास्त्रलेख, सद्बोध, दोष दाखविणें, सुधारणूक, नीतिशिक्षण यांकरितां उपयोगी आहे, १७ त्याच्यापासून देवभक्त पूर्ण होऊन प्रत्येक चांगल्या कामास सज्ज होतो.

४ १ देवासमक्ष आणि जो ख्रिस्त येशू जीवंतांचा व मृतांचा न्याय करील त्याच्यासमक्ष त्याच्या प्रकट होण्याची व त्याच्या राज्याची शपथ वाहून मी सांगतों कीं २ वचनाची घोषणा कर, सुवेळीं अवेळीं तयार राहा, सर्व प्रकारच्या सहनशीलतेनें व शिक्षणानें दोष दाखीव, वाग्दंड कर व बोध कर. ३ कारण ते सुशिक्षण सहन करणार नाहींत, तर त्यांचे कान खाजत असतां, ते स्वेच्छाचारानें आपणांसाठीं शिक्षकांची रास घालतील, ४ आणि ते सत्य ऐकतनासे होतील, व कहाण्यांकडे वळतील, अशी वेळ येईल. ५ तूं सर्व गोष्टींविषयीं सावध ऐस, दुःखें सोस, सुवार्तिकाचें काम कर, तुला सोपलेली सेवा पूर्ण कर. ६ कारण आतां माझें अर्पण होत आहे, आणि माझा प्रयाणकाळ जवळ आला आहे. ७ जें सुयुद्ध तें मीं केलें आहे, धाव संपविली आहे, विश्वास राखिला आहे; ८ आतां राहिलें तें हेंच कीं, मजसाठीं नीतिमत्वाचा मुगूट ठेविला आहे तो त्या दिवशीं नीतिमान् न्यायाधीश प्रभु मला देईल; आणि तो केवळ मलाच नव्हे, तर त्याचें प्रकट होणें ज्यांस प्रिय झालें आहे त्या सर्वांसहि देईल.

### संदेश व नमस्कार

९ तूं होईल तितकें करून माझ्याकडे लवकर ये. १० कारण देमास याला ऐहिक सुख प्रिय असल्यामुळें तो मला सोडून थेस्सलनीकास गेला; क्रेस्केस गलतियास, तीत दालमतियास गेला. ११ लूक मात्र माझ्याजवळ आहे. मार्काला आपल्याबरोबर घेऊन ये. कारण तो सेवेसाठीं मला उपयोगी आहे. १२ तुखिकाला मीं इफिसास पाठविलें आहे. १३ जो माझा झगा त्रोवसांत कार्पाजवळ राहिला आहे तो येतेवेळेस आण, आणि पुस्तकें, विशेषेंकरून चर्मपत्रें, तींहि आण. १४ आलेक्सांद्र तांबटानें माझें पुष्कळ वाईट केलें, त्याची 'फेड त्याच्या कर्माप्रमाणें प्रभु करील;' १५ त्याविषयीं तूंहि जप, कारण तो आमच्या बोलण्यास फार आडवा आला. १६ माझ्या पहिल्या जबाबाच्या वेळेस माझ्या पक्षाचा कोणी नव्हता, सर्वांनीं मला सोडिलें; यांबद्दल त्यांचा हिशेब घेण्यांत न येवो. १७ तरी प्रभु माझ्या पक्षाचा होता; मजकडून घोषणा पूर्णपणें व्हावी आणि ती सर्व विदेशी लोकांनीं ऐकावी म्हणून त्यानें मला शक्ति दिली; आणि 'सिंहाच्या मुखांतून' सोडविलें. १८ प्रभु मला सर्व दुष्ट योजनांपासून सोडवील, व आपल्या स्वर्गीय राज्यांत घेण्यासाठीं तारील; त्याला युगानुयुग

गौरव असो. आमेन.
१९ प्रिस्का, अकिला व अनेसिफराच्या घरचीं माणसें
यांस सलाम सांग. २० एरास्त करिंथांत राहिला; त्रफिम
आजारी झाला. त्याला मिलेतांत ठेवून आलों. २१ होईल
तितकें करून हिंवाळ्यापूर्वी ये. युबूल व पुदेस, लीन व
क्लौदिया व सर्व बंधु तुला सलाम सांगतात.
२२ प्रभु तुझ्या आत्म्याबरोबर असो. तुम्हांवर कृपा
असो.

# पौलाचें तीताला पत्र



## नमस्कार

१, २, ३, ४ विश्वासांत साम्य असल्यामुळें
**१** मला खऱ्याखुऱ्या पुत्रासमान असलेला तीत याला जें
युगानुयुगाचें जीवन सत्यप्रतिज्ञ देवानें युगकालांपूर्वी
देऊं केलें आणि त्याविषयींचें वचन त्याच आपल्या
तारणाऱ्या देवाच्या आज्ञेनें मला सोंपलेल्या घोषणेंत
यथाकाळीं त्यानें प्रकट केलें, त्या जीवनाची आशा
बाळगणारे असे देवाचे निवडलेले लोक यांच्या विश्वासासाठीं
आणि सुभक्तिदायक सत्याच्या ज्ञानासाठीं येशू ख्रिस्ताचा
प्रेषित, देवाचा दास पौल, याजकडून: देवपित्यापासून व
ख्रिस्त येशू आपला तारणारा याजपासून कृपा व शांति असो.

## वडिलांची नेमणूक

५ मीं तुला क्रेतांत यासाठीं ठेविलें कीं तूं बाकी
राहिलेल्या गोष्टींची व्यवस्था करावी, आणि मीं तुला
आज्ञा केल्याप्रमाणें नगरोनगरीं वडील[1] नेमावे. ६ जो नेमा-
वयाचा तो अदूष्य, एका स्त्रीचा पति असावा; ज्याचीं
मुलें विश्वास ठेवणारीं आहेत, ज्यांवर दंगल करण्याचा
आरोप आलेला नसून जीं अनिवार नाहींत, असा तो असावा.
७ अध्यक्ष[2] हा देवाचा कारभारी आहे म्हणून तो अदूष्य
असला पाहिजे; तो स्वच्छंदी, रागीट, मद्यपी, मारका,
पैसे खाणारा नसावा; ८ तर अतिथिप्रिय, चांगुलपणाची
आवड धरणारा, मर्यादशील, नीतिमान्, पवित्र, संयमी
९ आणि दिलेल्या शिक्षणाप्रमाणें जें विश्वसनीय वचन
त्याला धरून राहणारा असा असावा; यासाठीं कीं त्यानें
सुशिक्षणानें बोध करावयास व उलट बोलणाऱ्यांस कुंठित
करावयासहि शक्तिमान् व्हावें.

## खोटे शिक्षक

१० कारण अनिवार व व्यर्थ बोलणारे आणि फसविणारे
असे पुष्कळ लोक आहेत, त्यांत विशेषेंकरून सुंता झालेले
आहेत; ११ त्यांचें तोंड बंद केलें पाहिजे; जें शिकवूं
नये तें पोटासाठीं शिकवून ते संपूर्ण घराण्यांचा नाश
करितात. १२ त्या लोकांतील त्यांच्याच कोणाएका
संदेष्ट्यानें म्हटलें आहे: ‘क्रेतीय सदा लबाड, दुष्ट पशु,
आळशी पोटपोशे असतात.’ १३ ही साक्ष खरी आहे;
म्हणून कडकपणें त्यांच्या पदरीं दोष घाल. १४ त्यांनीं
यहूदी कहाण्या आणि सत्यापासून बहकलेल्या मनुष्यांच्या
आज्ञा यांकडे लक्ष न देतां विश्वासांत दृढ व्हावें म्हणून
हें कर. १५ शुद्ध जनांस सर्व शुद्ध आहे, परंतु विटाळलेले
व विश्वास न ठेवणारे यांस कांहींच शुद्ध नाहीं; त्यांची
बुद्धि व मन हीं विटाळलीं आहेत. १६ आपण देवाला
ओळखतों असें ते बोलून दाखवितात, परंतु कृतींनीं त्याला
नाकारितात; ते अमंगळ, आज्ञाभंजक व प्रत्येक चांगल्या
कामास नालायक आहेत.

## ख्रिस्तविश्वास साजेशी वागणूक

१ तूं तर सुशिक्षणाला जें शोभेल तें बोल:
**२** २ असें कीं वृद्ध पुरुषांनीं नेमस्त, गंभीर, मर्यादशील
असून विश्वास, प्रीति व सहनता ह्यांमध्यें दृढ राहावें.
३ तसेंच वृद्ध स्त्रियांनीं चालचलणुकींत वंदनशील
असावें; त्या चहाड, मद्यपानासक्त नसाव्या; सुशिक्षण
देणाऱ्या असाव्या; ४ त्यांनीं तरुण स्त्रियांस असें शिक्षण
द्यावें कीं त्यांनीं आपल्या नवऱ्यांवर व मुलांबाळांवर

१ मुळांत: प्रेस्बुतर २ मुळांत: एपिस्कोप

प्रीति करावी; ५ मर्यादशील, शुद्धाचरणी, घरचें काम पाहणाऱ्या, मायाळू, आपल्या नवऱ्यांच्या अधीन राहणाऱ्या, असें असावें, म्हणजे देवाच्या वचनाची निंदा होणार नाहीं. ६ तसेंच तरुण पुरुषांनीं मर्यादशील असावें म्हणून त्यांना बोध कर. ७ सर्व गोष्टींविषयीं चांगल्या कामाचा कित्ता असें आपणाला दाखीव; शुद्धता, गांभीर्य व ज्याला दोष लावितां येत नाहीं असें सद्भाषण यांनीं तुझें शिक्षण युक्त असूं दे; ८ यासाठीं कीं विरोध्याला आपल्याविषयीं कांहीं वाईट बोलण्यास जागा नसल्यामुळें लाज वाटावी. ९ दासांनीं आपल्या धन्यांच्या अधीन राहावें; त्यांस सर्व प्रकारें संतुष्ट करावें, उलट बोलूं नये, १० अपहार करूं नये, तर सर्व प्रकारें इमानेंइतबारें वागावें; यासाठीं कीं त्यांनीं सर्व गोष्टींत आपला तारणारा देव याच्या शिक्षणास शोभा आणावी; असा बोध कर.

## ख्रिस्तशिष्यास साजेसे हेतु

११ कारण सर्व मनुष्यांस तारण देणारी अशी देवाची कृपा प्रकट झाली आहे; ती आपल्याला असें शिकविते कीं, १२, १३ धन्य आशाप्राप्तीची म्हणजे थोर देवाचें व आपला तारणारा येशू ख्रिस्त याचें गौरव प्रकट होण्याची वाट पाहत आपण अधर्माला व ऐहिक वासनांला नाकारून सांप्रतच्या युगांत मर्यादेनें, नीतीनें व धार्मिक वृत्तीनें वागावें. १४ त्यानें स्वतःला आपल्याकरितां दिलें, यासाठीं कीं ‘त्यानें खंडणी देऊन आपल्याला सर्व अधर्मापासून मुक्त करावें,’ आणि चांगल्या कामांत तत्पर करून आपले ‘स्वतःचे लोक असे आपणासाठीं शुद्ध करून ठेवावे.’

१५ या गोष्टी सांगून बोध कर आणि सर्व अधिकारानें दोष पदरीं घाल. कोणी तुला तुच्छ मानूं नये.

## ख्रिस्तशिष्यास साजेसें वर्तन व त्याचा पाया

३ १ त्यांनीं सत्ता व अधिकार यांच्या अधीन राहावें, आज्ञा मानाव्या, प्रत्येक चांगल्या कामास सिद्ध असावें; २ कोणाची निंदा करूं नये, भांडखोरपणा न करितां सौम्य व सर्व मनुष्यांबरोबर सर्व प्रकारें नम्रतेनें वागणारे असावें, अशी त्यांस आठवण दे. ३ कारण आपणहि पूर्वी निर्बुद्धि, अवज्ञा करणारे, बहकलेले, नाना प्रकारच्या वासनांचें व विलासांचें दास्य करणारे, दुष्टपणा व हेवा यांत आयुष्य घालविणारे, द्वेषपात्र व एकमेकांचा द्वेष करणारे, असे होतों; ४ परंतु जेव्हां आपला तारणारा देव याची दया व मनुष्यांवरील प्रीति प्रकट झाली, ५ तेव्हां आपण केलेल्या नीतीच्या कर्मांनीं नव्हे, तर नव्या जन्माचें स्नान व पवित्र आत्म्यानें केलेलें नवीकरण यांच्या द्वारें त्यानें आपल्या दयेनुसार आपल्याला तारिलें. ६ त्यानें तो आत्मा आपला तारणारा येशू ख्रिस्त याच्याद्वारें आपल्यावर विपुल ओतिला; ७ यासाठीं कीं आपण त्याच्या कृपेनें नीतिमान् ठरून आशा धरल्याप्रमाणें युगानुयुगाच्या जीवनाचे वारीस व्हावें. ८ हें वचन विश्वसनीय आहे, आणि तूं या गोष्टींविषयीं खात्रीनें सांगत असावें अशी माझी इच्छा आहे, यासाठीं कीं ज्यांनीं देवावर विश्वास ठेविला आहे त्यांनीं चांगलीं कर्मे आचरण्याचें मनावर घ्यावें. या गोष्टी मनुष्यांस चांगल्या व हितकारक आहेत. ९ मूर्खपणाचे वाद, वंशावळ्या, कलह व नियमशास्त्राविषयीं भांडणें, यांपासून दूर राहा; कारण तीं निरुपयोगी व व्यर्थ आहेत. १० तट पाडणाऱ्या मनुष्याला एकदा दोनदा बोध करून मग वर्ज कर; ११ असा मनुष्य बिघडला आहे, आणि त्यानें स्वतःसच दोषी ठरविलें असून तो पाप करितो, हें तुला ठाऊक आहे.

## नमस्कार

१२ मी अर्तमाला किंवा तुखिकाला तुजकडे पाठविलें म्हणजे होईल तितकें करून मजकडे निकपलिसास निघून ये, कारण तेथें हिंवाळा घालविण्याचा मीं निश्चय केला आहे. १३ जेना शास्त्री व अपुल्लो यांस कांहीं उणें पडूं नये म्हणून होईल तितक्या तयारीनें त्यांस रवाना कर. १४ आपल्या लोकांनीं अगत्याच्या बाबींसंबंधीं गरजा पुरविणारीं चांगलीं कर्में आचरण्यास शिकावें, म्हणजे ते निष्फळ होणार नाहींत.

१५ माझ्याबरोबरचे सर्व तुला सलाम सांगतात. विश्वासामधील जे लोक आम्हांवर प्रीति करितात त्यांस सलाम सांग.

तुम्हां सर्वांबरोबर कृपा असो.

# पौलाचें फिलेमोनाला पत्र



## प्रस्तावना

१,२ आम्हांस प्रिय असलेला व आमचा सहकारी फिलेमोन याला, आमची बहीण अप्फिया इला, आमचा सहसैनिक अर्खिप्प व तुझ्या घरांतील मंडळी यांना, ख्रिस्त येशूचा बंदिवान पौल व आमचा बंधु तीमथ्य यांजकडून: ३ देव आपला पिता व प्रभु येशू ख्रिस्त यांजपासून तुम्हांस कृपा व शांति असो.

## एका पळपुट्या गुलामाच्या तर्फे विनंति

४,५ तुझी प्रीति आणि प्रभु येशूवर व सर्व पवित्र जनांवर जो तुझा विश्वास, त्याविषयीं ऐकून मी आपल्या प्रार्थनांत सर्वदा तुझी आठवण करितों व आपल्या देवाचें उपकारस्मरण करितों; ६ यासाठीं कीं तुम्हांमध्यें जें कांहीं चांगलें आहे त्याचें ज्ञान झाल्यानें तुझ्या विश्वासाचें भागीपण ख्रिस्तासाठीं सफळ व्हावें. ७ तुझ्या प्रीतीनें मला फार आनंद व सांत्वन झालें; कारण, हे बंधो, तुझ्या हातून पवित्र जनांच्या जिवाला विश्रांति मिळाली आहे.

८ यास्तव जें उचित तें तुला आज्ञा करून सांगण्याचें जरी मला ख्रिस्तद्वारा पूर्ण धैर्य आहे, ९ तरी प्रीतीस्तव विनंति करणें मला बरें वाटतें. मी वृद्ध झालेला पौल, आणि आतां ख्रिस्त येशूचा बंदिवान, १० मीं बंधनांत असतां ज्याला जन्म दिला त्या माझ्या अनेसिम मुलाविषयीं तुला विनंति करितों; ११ तो पूर्वी तुला निरुपयोगी होता, तरी आतां तुला व मलाहि उपयोगी आहे. १२ त्याला स्वतःला म्हणजे माझ्या प्राणालाच मीं तुजकडे परत पाठविलें आहे. १३ सुवार्तेमुळें पडलेल्या बंधनांत माझी सेवा तुझ्याबद्दल त्यानें करावी म्हणून त्याला जवळ ठेवण्याचें माझ्या मनांत होतें; १४ तरी तुझ्या संमतीवांचून कांहीं करणें मला बरें वाटलें नाहीं; यासाठीं कीं तुझा उपकार जुलमानें झाल्यासारिखा नसावा, तर खुशीनें केलेला असावा. १५ कदाचित् तो तुजपासून यामुळेंच कांहीं वेळ वेगळा झाला असेल कीं त्यानें युगानुयुग तुझा असें व्हावें; १६ आजपासून केवळ दासच नव्हे तर दासापेक्षां अधिक, म्हणजे प्रियबंधु, असें व्हावें; मला विशेष प्रिय आणि तुला तर देहसंबंधानें व प्रभूसंबंधानें याहून किती तरी अधिक प्रिय व्हावें. १७ यास्तव जर तूं मला भागीदार समजतोस, तर तो मीच आहें असें मानून त्याचा अंगीकार कर. १८ त्यानें तुझें कांहीं नुकसान केलें असलें किंवा त्याकडे तुझें कांहीं देणें असलें तर तें माझ्या खातीं मांड; १९ हा माझा पौलाचा स्वदस्तुरचा लेख आहे; तें मी फेडीन; तूं स्वतःच माझें ऋण आहेस, पण हें मी तुला म्हणत नाहीं. २० हो, बंधो, तुजकडून मला प्रभूमध्यें लाभ व्हावा; माझ्या जिवाला ख्रिस्तामध्यें विश्रांति दे.

२१ तूं हें मान्य करशील अशा भरवशानें मीं तुला लिहिलें आहे, आणि मला ठाऊक आहे कीं हें सांगितल्यापेक्षां तूं अधिकहि करशील.

## समाप्ति

२२ दुसरें हें कीं, माझ्यासाठीं बिऱ्हाड तयार कर. कारण तुमच्या प्रार्थनांनीं मी तुम्हांस देणगी असा दिला जाईन अशी माझी आशा आहे.

२३ ख्रिस्त येशूमध्यें माझा सहबंदिवान एपफ्रा, २४ मार्क अरिस्तार्ख, देमास, लूक, हे माझे सहकारी तुला सलाम सांगतात.

२५ आपला प्रभु येशू ख्रिस्त याची कृपा तुमच्या आत्म्याबरोबर असो. आमेन.

# इब्री लोकांस पत्र



### प्रस्तावना

१ देव प्राचीनकाळीं अंशाअंशांनीं व प्रकारप्रकारांनीं
**१** आपल्या पूर्वजांशीं संदेष्ट्यांच्या द्वारें बोलला. २ तो
या काळाच्या शेवटीं आपल्याशीं पुत्राच्या द्वारें
बोलला आहे; त्यानें त्याला सर्वांचा वारीस करून ठेविलें
आणि त्याच्या द्वारें त्यानें विश्व उत्पन्न केलें; ३ हा
त्याच्या गौरवाचें तेज, व त्याच्या तत्त्वाचें प्रतिरूप आहे;
आणि आपल्या सामर्थ्याच्या शब्दानें विश्वाधार असून,
पापांची शुद्धि केल्यावर तो ऊर्ध्वलोकीं राजाधिराज जो
ईश्वर त्याच्या ‘ उजवीकडे बसला; ’ ४ जेवढ्यानें त्यास
देवदूतापेक्षां वारशानें श्रेष्ठ नाम मिळालें आहे तेवढ्यानें
तो त्यांच्यापेक्षां अधिक श्रेष्ठ झाला.

### देवाचा पुत्र देवदूतापेक्षां श्रेष्ठ आहे

५ त्यानें कोणत्या देवदूताला कधीं असें म्हटलें :
तूं माझा पुत्र आहेस,
आज मीं तुला जन्म दिला आहे ?
आणि पुनः,
मी त्याचा पिता असा होईन,
आणि तो माझा पुत्र असा होईल ?
६ तो ज्येष्ठ पुत्राला पुनः जगांत आणील त्या समयाविषयीं
तो असें म्हणतो : ‘ देवाचे सर्व दूत त्याच्या चरणीं
लागोत; ’
७ आणि देवदूतांविषयीं तो म्हणतो :
तो आपले देवदूत वायु,
आणि आपले सेवक अग्निज्वाळा असे करितो;
८ पुत्राविषयीं तो असें म्हणतो :
हे देवा, तुझें राजासन युगानुयुगींचें आहे;
आणि तुझें राजवेत्र सरळतेचें वेत्र आहे.
९ तुला न्यायाची आवड आणि अधर्माचा वीट आहे;
म्हणून देवानें, तुझ्या देवानें,
तुझ्या सोबत्यांपेक्षां श्रेष्ठ असा हर्षरूपी तेलाचा अभि-
षेक तुला केला आहे,
१० आणि,
हे प्रभू , तूं प्रारंभीं पृथ्वीचा पाया घातला,
आणि गगनें तुझ्या हातचें कृत्य आहे;
११ तीं नाहींतशीं होतील; परंतु तूं निरंतर आहेस;
तीं सर्व वस्त्रासारखीं जीर्ण होतील;
१२ तूं त्यांस झग्यासारखें गुंडाळून टाकशील,
वस्त्रासारखें ठेवशील, आणि तीं पालटतील;
परंतु तूं तसाच राहतोस,
तुझीं वर्षें संपणार नाहींत,
१३ पण त्यानें कोणत्या देवदूताविषयीं असें कधीं म्हटलें :
मी तुझे वैरी तुझें पादासन
करीपर्यंत
तूं माझ्या उजवीकडे बैस ?
१४ ते सर्व वारशानें तारणप्राप्ति होत असलेल्यांसाठीं सेवा
करावयास पाठविलेले असे परिचारक आत्मे नाहींत काय ?

१ यामुळें ऐकलेल्या गोष्टींकडे आपण विशेष लक्ष
**२** लाविलें पाहिजे, नाहींतर आपण त्यांपासून वाहवून
जाऊं, २ देवदूतांच्या द्वारें सांगितलेलें वचन जर दृढ
होतें आणि प्रत्येक उल्लंघनाचें व आज्ञाभंगाचें यथान्याय
फळ देण्यांत आलें; ३ तर आपण एवढ्या मोठ्या तार-
णाची उपेक्षा केल्यास कसें निभावूं ? तें सांगण्याचा आरंभ
प्रभूकडून झाला असून तें ऐकणाऱ्यांनीं त्याविषयीं आम-
च्याला प्रमाण पटविलें; ४ त्यांबरोबर देवानेंहि चिन्हें,
अद्भुतें व नाना प्रकारचे पराक्रम करून आणि आपल्या
इच्छेप्रमाणें पवित्र आत्म्याचीं दानें वांटून देऊन साक्ष
दिली.

५ ज्या भावी जगाच्या व्यवस्थेविषयीं आम्हीं बोलत
आहों ती त्यानें देवदूतांच्या अधीन ठेविली नाहीं.
६ एका ठिकाणीं कोणीं अशी साक्ष दिली आहे :
मर्त्य मनुष्य तो काय कीं तूं त्याची आठवण करावी ?

अथवा मानव तो काय कीं तूं त्याला दर्शन द्यावें?
७ तूं त्याला देवदूतांपेक्षां किंचित् कमी केलें आहे;
तूं त्याला गौरव व थोरवी यांनीं मुकुटमंडित केलें आहे;
आणि तूं आपल्या हातच्या कृत्यांवर त्याला नेमिलें आहे;
८ तूं सर्व कांहीं त्याच्या अधीन, त्याच्या पायांखालीं, ठेविलें आहे.

'सर्व कांहीं त्याच्या अधीन ठेविलें आहे,' म्हणजे
त्याच्या अधीन ठेविलेलें नाहीं असें कांहीं राहूं दिलें नाहीं;
परंतु 'सर्व कांहीं त्याच्या अधीन ठेविलें आहे,' असें
आजपर्यंत आपल्या दृष्टीस पडलें नाहीं खरें. ९ तरी ज्या
येशूला देवदूतांपेक्षां किंचित् कमी केलें होतें, तो मरण
सोसल्यामुळें गौरव व थोरवी यांनीं मुकुटमंडित केलेला
असा आपल्या दृष्टीस पडतो; त्यानें देवाच्या कृपेनें सर्वां-
करितां मरणाचा अनुभव घ्यावा म्हणून असें झालें. १०
ज्यासाठीं सर्व कांहीं आहे, व ज्याच्या द्वारें सर्व कांहीं
आहे, त्यानें पुष्कळ पुत्रांस गौरवांत आणितांना त्यांच्या
तारणाचा जो कर्ता त्याला दुःख सोसण्यानें परिपूर्ण करावें
हें योग्य होतें. ११ पवित्र करणारा पुरुष व पवित्र केलेले
लोक हे सर्व एकापासून आहेत; या कारणास्तव तो त्यांस
बंधु म्हणावयास लाजत नाहीं. १२ तो म्हणतो :

मीं आपल्या बांधवांजवळ तुझ्या नामाची कीर्ति वर्णीन,
लोकसभेंत तुझें स्तवन करीन;

१३ आणि पुनः तो म्हणतो: 'मी त्याजवर भरवसा
ठेवीन.' तसेंच 'पाहा, मी व देवानें मला दिलेलीं मुलें.'
१४ ज्या अर्थी 'मुलें' एकाच रक्तमांसाचीं होतीं त्या
अर्थी तोहि त्यांच्यासारखा रक्तामांसाचा झाला; यासाठीं कीं
मरणावर धनीपणा करणारा म्हणजे सैतान, याला आपल्या
मरणानें नाहींसें करावें; १५ आणि जे मरणाच्या भयानें
आयुष्यभर दासपणानें बांधलेले त्या सर्वांस मोकळें करावें.
१६ सर्वांस माहीत आहे कीं तो देवदूतांच्या साहाय्यास
नव्हे तर 'अब्राहामाच्या संतानाच्या साहाय्यास येतो.' १७
यास्तव त्याला सर्व प्रकारें आपल्या बंधुवर्गासारखें होणें
अगत्य होतें, यासाठीं कीं लोकांच्या पापांचें प्रायश्चित्त
करण्याकरितां आपण देवसंबंधीं गोष्टींविषयीं दयाळू व
विश्वासू मुख्य याजक व्हावें. १८ कारण ज्या अर्थी त्यानें
स्वतः परीक्षेचें दुःख भोगिलें त्या अर्थी ज्यांची परीक्षा
होते त्यांना साहाय्य करावयास तो समर्थ झाला आहे.

## ख्रिस्त हा मोशापेक्षां श्रेष्ठ आहे

३ १ यास्तव पवित्र बंधूंनो, स्वर्गातल्या पाचारणाचे
भागीदारहो, आपण स्वीकारिलेल्या धर्माचा प्रेषित व
मुख्य याजक येशू याजकडे लक्ष लावा. २ तो
आपल्या नेमणाऱ्याशीं 'विश्वासू' होता; तसा 'मोशेहि
देवाच्या सर्व घराण्यांत विश्वासू होता.' ३ जितक्यानें घर
बांधणाऱ्याला घरापेक्षां अधिक सन्मान आहे तितक्यानें
हा मोशापेक्षां अधिक वैभवास योग्य मोजिलेला आहे. ४
प्रत्येक घर कोणीं तरी बांधिलेलें असतें; आणि सर्व वस्तु
करणारा देव आहे. ५ जें पुढें सांगावयाचें होतें त्याच्या
साक्षीसाठीं 'त्याच्या सर्व घराण्यांत मोशे हा सेवक ह्या
नात्यानें विश्वासू होता.' ६ ख्रिस्त हा पुत्र असा 'त्याच्या
घरावर' होता; आपण आपल्या आशेसंबंधीं भरवसा व
आपला अभिमान शेवटपर्यंत दृढ राखिल्यास त्याचें तें घर
आपण आहों. ७ यावरून,

आज जर तुम्ही त्याची वाणी ऐकाल,
८ तर रानांतील परीक्षेच्या दिवशीं इस्राएली लोकांनीं चिथावणी केल्याप्रमाणें,
तुम्ही आपलीं मनें कठीण करूं नका.
९ तेथें तुमच्या वाडवडिलांनीं कसोटीस लावून मला पारखलें,
आणि चाळीस वर्षें माझीं कृत्यें पाहिलीं.
१० त्यामुळें त्या पिढीला कंटाळून मी म्हणालों,
हे सर्वदा भ्रांत मनाचे लोक आहेत,
ह्यांनीं माझे मार्ग जाणिले नाहींत;
११ त्याप्रमाणें मी रागानें शपथ वाहून म्हणालों,
हे[1] माझ्याबरोबर विसावा भोगावयाचे नाहींत.

१२ बंधुजनहो, या शास्त्रलेखांत पवित्र आत्म्यानें म्हटल्या-

१ **मुळांत** : हे माझ्या विश्रामस्थानीं निश्चयें यावयाचे नाहींत.

प्रमाणें जीवंत देवाला सोडून द्यावें, असें अविश्वासाचें
दुष्ट मन तुम्हांतील कोणाचेंहि होऊं नये म्हणून जपा.

### शेवटपर्यंत विश्वासाची आवश्यकता

१३ जोंपर्यंत 'आज' म्हटलेला वेळ आहे तोंपर्यंत
एकमेकांस तुम्ही प्रतिदिवशीं बोध करा, यासाठीं कीं
पापाच्या फसवणुकीनें तुम्हांतील कोणी 'कठीण' होऊं
नये. १४ कारण जर आपण आपला आरंभींचा भरवसा
शेवटपर्यंत दृढ धरिला तर ख्रिस्तामध्यें आपल्याला अंश-
भाग आहे. १५ असें म्हटलें आहे :

आज जर तुम्ही त्याची वाणी ऐकाल,
तर चिथावणींत केल्याप्रमाणें तुम्ही आपलीं मनें
कठीण करूं नका.

१६ यांत सांगितलेलें ऐकून 'चिथावणारे' ते कोण होते ?
मोशाच्या हस्तें मिसरांतून निघालेले सर्वच नव्हत काय ?
१७ 'चाळीस वर्षें' तो कोणास 'कंटाळला ?' ज्यांनीं पाप केलें,
ज्यांचीं 'प्रेतें रानांत पडलीं,' त्यांस नव्हे काय ? १८ 'शपथ
वाहून' कोणाला म्हणाला कीं 'तुम्ही माझ्या विश्रामस्थानीं
येणारच नाहीं !' ज्यांनीं अवज्ञा केली त्यांसच कीं नाहीं ?
१९ तर अविश्वासामुळें त्यांच्यानें आंत येववलें नाहीं असें
आपल्याला दिसून येतें.

४ १ यास्तव 'त्याच्या विश्रामस्थानीं 'येण्याविषयींचें
वचन अद्यापि देऊन ठेविलेलें आहे; यामुळें तुम्हां-
तील कोणी त्याला अंतरल्यासारखें दिसूं नये म्हणून
धास्ती बाळगून असा. २ त्यांच्यासारखी आपल्यालाहि
सुवार्ता सांगण्यांत आली आहे, परंतु ऐकलेलें वचन त्यांस
लाभदायक झालें नाहीं; कारण ऐकणाऱ्यांमध्यें विश्वासा-
बरोबर त्याचें सम्मेलन झालें नाहीं.

३ त्याप्रमाणें मी आपल्या रागानें शपथ वाहून म्हणालों,
ते माझ्या विश्रामस्थानीं येणारच नाहींत; या लेखांत
त्यानें सांगितलेल्या 'विश्रामस्थानीं' 'आपण' जे विश्वास
ठेविलेले आहों ते 'येतों;' त्याचीं 'कृत्यें' जगाच्या
स्थापनेपासून समाप्त झालीं. ४ कारण सातव्या दिवसाविषयीं
एका ठिकाणीं त्यानें असें म्हटलें आहे कीं 'सातव्या दिवशीं
देवानें आपलीं सर्व कृत्यें संपवून विश्रांति घेतली;' ५ आणि,
ते माझ्या विश्रामस्थानीं येणारच नाहींत,

असाहि हा लेख आहे. ६ कोणी तरी त्यांत यावयाला
पाहिजे होतें, तें राहिलें आहे; आणि ज्यांस पूर्वी सुवार्ता
सांगण्यांत आली होती ते अवज्ञेमुळें त्यांत आले नाहींत;
७ म्हणून इतक्या काळानंतर दाविदाच्या द्वारें सांगितलेल्या
वरील लेखाप्रमाणें त्यानें 'आज' असा एक दिवसहि
ठरविला; तो लेख असा :

आज जर तुम्ही त्याची वाणी ऐकाल,
तर आपलीं मनें कठीण करूं नका.

८ यहोशवानें त्यांस विसावा दिला असता तर त्यानंतर
त्यानें दुसऱ्या दिवसाविषयीं म्हटलें नसतें. ९ यास्तव
देवाच्या लोकांसाठीं शब्बाथाचा विसावा राहिला आहे.
१० 'जो कोणी त्याच्या विसाव्यांत आला आहे' त्यानें,
जसा 'देवानें आपलीं कृत्यें संपवून विसावा घेतला' तसा
'आपलींहि कृत्यें संपवून विसावा घेतला आहे.' ११
यास्तव त्या 'विसाव्यांत येण्यास' आपण होईल तितका
प्रयत्न करावा, यासाठीं कीं त्यांच्या अवज्ञेच्या उदाहरणा-
प्रमाणें कोणी पतित होऊं नये. १२ देवाचें वचन सजीव,
सतेज, कोणत्याहि दुधारी तरवारीपेक्षा तीक्ष्ण, जीव व आत्मा,
सांधे व मज्जा यांस भेदून आरपार जाणारें आणि मनाच्या
भावना व कल्पना यांचें परीक्षक असें आहे; १३ आणि
त्याच्या दृष्टीला अदृश्य अशी कोणतीहि सृष्ट वस्तु नाहीं,
तर ज्याच्याबरोबर आपला संबंध आहे त्याच्या दृष्टीला सर्व
उघडेंवाघडें आहे.

### येशू सर्वश्रेष्ठ प्रमुख याजक—अहरोनाहून श्रेष्ठ

१४ तर मग आकाशांतून पार गेलेला देवाचा पुत्र येशू
हा थोर प्रमुख याजक आपल्याला आहे, म्हणून आपण जो
स्वीकार केला तो दृढ धरून राहूं. १५ कारण ज्याला आपल्या
अशक्तपणाचें दुःख होत नाहीं, असा आपला प्रमुख याजक
नाहीं, तर तो सर्व प्रकारें आपल्याप्रमाणें पारखलेला होता;
तरी निष्पाप राहिला. १६ आपल्याला दया प्राप्त व्हावी
आणि गरजेच्या वेळीं साहाय्य होण्यासाठीं कृपा मिळावी,
म्हणून आपण धैर्यानें कृपेच्या राजासनाजवळ जाऊं.

५ १ प्रत्येक प्रमुख याजक मनुष्यांपैकीं घेतलेला
असल्यामुळें देवविषयक गोष्टींबाबत तो मनुष्यांकरितां
नेमिलेला असतो, यासाठीं कीं त्यानें पापांबद्दल दानें

व यज्ञपशु अर्पावे; २ अज्ञानी व बहकणारे यांच्याबरोबर
तो सौम्यतेनें वागणारा असतो, कारण तोहि स्वतः अशक्त-
पणानें व्याप्त आहे; ३ आणि या अशक्तपणामुळें त्यानें
जसें लोकांसाठीं तसें स्वतःसाठींहि पापांबद्दल अर्पण केलें
पाहिजे. ४ ही पदवी कोणी आपण होऊन घेत नाहीं, तर
अहरोनाप्रमाणें देवानें ज्याला पाचारण केलें आहे त्याला
मिळते. ५ तदनुसार ख्रिस्तानेंहि प्रमुख याजक होण्यासाठीं
आपणा स्वतःला गौरविलें नाहीं, तर ज्यानें त्याला
म्हटलें कीं

तूं माझा पुत्र आहेस,
आज मीं तुला जन्म दिला आहे,

त्यानें त्याला गौरविलें. ६ त्याप्रमाणें दुसऱ्या ठिकाणींहि तो
म्हणतो,

मलकीसदेकाच्या संप्रदायाप्रमाणें
तूं युगानुयुग याजक आहेस.

७ त्यानें आपल्या देहावस्थेच्या दिवसांत, स्वतःला
मरणापासून तारावयास जो शक्तिमान् त्याजवळ मोठ्या
आक्रोशानें व अश्रु गाळीत प्रार्थना व विनवणी केली, आणि
ती त्याच्या सुभक्तीमुळें ऐकण्यांत आली; ८ तो पुत्र
असतांहि त्यानें जें दुःख सोसिलें तेणेंकरून तो आज्ञांकित-
पणा शिकला; ९ आणि सिद्ध होऊन तो आपल्या आज्ञेंत
राहणाऱ्या सर्वांचा युगानुयुगाचा तारणकर्ता झाला. १०
त्याला 'मलकीसदेकाच्या संप्रदायाप्रमाणें' प्रमुख याजक
असें नांव देवाकडून देण्यांत आलें.

## खऱ्या ख्रिस्तशिष्याच्या मार्गानें प्रगति करण्याची आवश्यकता

११ याविषयीं आम्हांस पुष्कळ सांगावयाचें आहे, तें
तुम्हांस समजावून सांगणें कठीण आहे, कारण तुम्ही ऐकण्या-
विषयीं मंद झालां आहां. १२ जे तुम्ही इतक्या काळांत
शिक्षक होण्यास पाहिजे होतां त्या तुम्हांस देवाच्या वच-
नांचीं मूळाक्षरें पुनः कोणीं तरी शिकवावीं याची गरज
आहे, आणि ज्यांस जड अन्न सोसत नाहीं, दूधच पाहिजे,
असे तुम्ही झालां आहां. १३ दुधावर राहणारा नीति-
मत्त्वाच्या वचनाविषयीं अपरिचित असतो; कारण तो बाळक
आहे. १४ ज्यांच्या इंद्रियांस वहिवाटीनें पथ्यापथ्य सम-
जण्याचा अभ्यास झाला आहे अशा प्रौढ मनुष्यांसाठीं
जडान्न आहे.

६ १ यास्तव आपण ख्रिस्ताविषयींच्या मूळारंभींच्या
गोष्टी सोडून प्रौढतेप्रत जाण्याचा नेटानें प्रयत्न करूं;
निर्जीव कर्मांचा पश्चात्ताप, देवावरचा विश्वास, २
आणि बाप्तिस्म्यांचें, हात वर ठेवण्याचें, मृतांच्या पुनरु-
त्थानाचें व सार्वकालिक न्यायाचें शिक्षण, हा पाया आपण
पुनः घालूं नये. ३ देव होऊं देईल तर हें आपण करूं. ४
कारण जे एकदां प्रकाशित झाले, ज्यांनीं स्वर्गीय दानाची
रुचि घेतली, जे पवित्र आत्म्याचे वांटेकरी झाले, ५
आणि ज्यांनीं देवाच्या सुवचनाची व येणाऱ्या युगाच्या
सामर्थ्यांची रुचि घेतली, ६ ते जर पतित झाले तर त्यांस
पश्चात्ताप होईल असें पुनः नवीन करणें अशक्य आहे; हें
त्यांचें पतन म्हणजे त्यांनीं देवाच्या पुत्राला नव्यानें वध-
स्तंभावर खिळणें व त्याचा उघड अपमान करणें असें आहे.
७ कारण जी 'भूमि' आपणावर वारंवार पडलेला पाऊस
पिऊन आपली लागवड करणाऱ्यांस उपयोगी अशी
'हिरवळ' उपजविते; तिला देवाचा आशीर्वाद मिळतो; ८
आणि जी भूमि 'कांटेझाडें व कुसळें उपजविते,' ती
टाकाऊ व शापित होण्याच्या लागास आलेली आहे; तिचा
शेवट जळणें हा आहे.

९ जरी आम्ही असें बोलतों तरी, प्रिय बंधूंनो, तुमची
स्थिति ह्यापेक्षां चांगली व तारणाकडे नेणारी आहे असा
आम्हांस तुम्हांविषयीं भरवसा आहे, १० कारण तुमचें
कार्य आणि तुम्हीं पवित्र जनांची केलेली व करीत अस-
लेली सेवा, यावरून जी प्रीति तुम्हीं त्याच्या नामावर
दाखविली तीहि देवानें विसरावी असा तो अन्यायी नाहीं.
११ आमची अशी उत्कंठा आहे कीं तुम्हांपैकीं प्रत्येकानें
आशेची पूर्ण खातरी करून घेण्यासाठीं तशीच आस्था
शेवटपर्यंत बाळगावी; १२ म्हणजे तुम्ही आळशी होणार
नाहीं, तर जे विश्वासानें व धीरानें वचनांचीं फळें वारशानें
उपभोगणारे होतात त्यांचे अनुकारी व्हाल.

## देवाच्या वचनांनीं आशेस स्फूर्ति येते

१३ देवानें अब्राहामाला वचन दिलें, तेव्हां त्याला
शपथ वाहण्यास स्वतःपेक्षां कोणी मोठा नसल्यामुळें, त्यानें

‘आपलीच शपथ वाहून’ म्हटलें कीं १४ ‘मी तुला आशी-
र्वाद देईनच देईन, व तुझें संतान वाढवीनच वाढवीन.’
१५ त्यानें धीरानें वाट पाहिली म्हणून त्याला त्याप्रमाणें
वचनाचें फळ प्राप्त झालें; १६ मनुष्यें आपणापेक्षां
मोठ्याची शपथ वाहतात; आणि आपलें स्थापित करण्या-
साठीं शपथ ही त्यांच्यामध्यें सर्व वादांचा शेवट आहे.
१७ यास्तव आपल्या संकल्पाची निर्विकारता वचनाच्या
वतनदारांस विशेष दाखवावी या इच्छेनें देव शपथेच्या
द्वारें मध्यें आला, १८ यासाठीं कीं ज्यांविषयीं खोटें बोलणें
देवाला अशक्य आहे अशा दोन निर्विकार गोष्टींनीं
आपल्याला चांगलें उत्तेजन यावें; ते आपण, स्वतःपुढें
ठेवण्यांत आलेली आशा धरून ठेवण्याकरितां आश्रयास
धावलों. १९ ती आशा आपल्याला जिवाचा नांगर आहे.
ती अचल, बळकट व ‘पडद्याच्या आंतल्या स्थळीं पोहंच-
णारा’ असा आहे; २० ‘तेथें मलकीसदेकाच्या संप्रदाया-
प्रमाणें युगानुगाचा’ प्रमुख याजक झालेला येशू अग्रगामी
असा आपल्याकरितां आंत गेला आहे.

### मलकीसदेकासारखा प्रमुख याजक येशू ख्रिस्त

७ १ हा ‘मलकीसदेक,’ ‘शालेमाचा राजा’ व
परात्पर देवाचा याजक होता; अब्राहाम राजांस मारून
परत आला तेव्हां त्यानें सामोरें जाऊन त्याला आशी-
र्वाद दिला. २ व त्याला ‘अब्राहामानें सर्व लुटीचा दशमांश
दिला;’ तो आपल्या नांवाच्या अर्थाप्रमाणें एक तर नीति-
मत्त्वाचा राजा आणि दुसरा ‘शालेमाचा राजा’ म्हणजे
शांतीचा राजा होता; ३ त्याचा बाप, आई, वंशावळ,
जन्मदिवस व आयुष्याचा शेवट हीं (सांगितलीं) नाहींत;
या गोष्टींनीं जो देवाच्या पुत्रासारखा झालेला तो सतत
राहणारा ‘याजक’ असा ठरतो.
४ तर आतां कुलाधिपति ‘अब्राहाम’ यानें ज्याला
लुटींतील उत्तम वस्तूंचा ‘दशमांश दिला’ तो केवढा मोठा
असावा हें पाहा. ५ लेवीच्या संतानांपैकीं ज्याला याजकपण
मिळतें त्यांस लोकांपासून, म्हणजे अब्राहामाच्या पोटीं जन्म
घेतलेल्या आपल्या बंधुवर्गापासून, नियमशास्त्राप्रमाणें दश-
मांश घेण्याची आज्ञा आहे; ६ परंतु ज्याचा वंश त्या
लोकांपासून नव्हता त्यानें अब्राहामापासून दशमांश घेतला
आणि ज्याला वचनें मिळालीं होतीं त्याला ‘आशीर्वाद
दिला.’ ७ श्रेष्ठाकडून कनिष्ठाला आशीर्वाद मिळतो हें
निर्विवाद आहे. ८ इकडे पाहतां मर्त्य मनुष्यांला ‘दशमांश
मिळतात, परंतु तिकडे, जीवंत राहणारा आहे अशी
ज्याविषयीं साक्ष आहे, त्याला मिळाले; ९ आणि दशमांश
घेणारा लेवी यानेंहि अब्राहामाच्या द्वारें दशमांश दिलेच
असें म्हणतां येईल. १० कारण ‘त्याच्या बापाला मलकी-
सदेक भेटला’ त्या वेळेस तो त्याच्या पोटीं होता.

११ यावरून ज्याच्या संबंधांत लोकांस नियमशास्त्र
प्राप्त झालें त्या लेवीय याजकपणानें पूर्णता झाली असती
तर मलकीसदेकाच्या संप्रदायाच्या दुसऱ्या ‘याजकाचा
उद्भव व्हावा व त्यानें अहरोनाच्या संप्रदायाप्रमाणें म्हटलेलें
नसावें यांचें काय अगत्य राहिलें असतें? १२ याजकपण
पालटलें म्हणजे नियमशास्त्रहि अवश्य पालटतें. १३ ज्याच्या-
विषयीं हें वचन सांगितलें तो, ज्या वंशांतल्या कोणीहि
वेदीजवळ काम केलें नव्हतें, अशा दुसऱ्या वंशांतला
आहे. १४ कारण आपला प्रभु यहूदापासून उत्पन्न झाला
हें उघड आहे; त्या वंशांतील याजकपणासंबंधानें मोशानें
कांहीं सांगितलें नाहीं; १५, १६ आणि दैहिक आज्ञेच्या
नियमानें नव्हे तर अक्षय्य जीवनाच्या सामर्थ्यानें झालेला
असा मलकीसदेकासारखा’ दुसरा ‘याजक’ झाला, यावरून
आम्हीं सांगितलें तें अधिकच स्पष्ट होतें. १७ त्याजविषयीं
अशी साक्ष आहे:

तूं मलकीसदेकाच्या संप्रदायाप्रमाणें
युगानुयुग याजक आहेस.

१८ पूर्वीची आज्ञा कमजोर व निरुपयोगी असल्यामुळें
तिचा लोप झाला आहे, १९ (कारण नियमशास्त्रानें कशा-
चीहि पूर्णता झाली नाहीं,) आणि अधिक चांगल्या
आशेची स्थापना झाली आहे; त्या आशेच्या द्वारें आपण
देवाजवळ जातों. २० ज्यापेक्षां तो शपथेवांचून याजक
झाला नाहीं, २१ (ते तर शपथेवांचून याजक झालेले
आहेत; पण

तूं युगानुयुग याजक आहेस अशी शपथ
परमेश्वरानें वाहिली
आणि ती तो बदलणार नाहीं,

असें त्यानें त्याजविषयीं सांगितलें त्याच्या त्या शपथेनें
हा याजक झाला. ) २२ त्यापेक्षां तो अधिक चांगल्या
कराराचा जामीन झाला आहे. २३ त्यांना येहमीं टिकून
राहण्यास मृत्यूचा अडथळा असल्यामुळें पुष्कळ याजक
होऊन गेले; २४ पण हा 'युगानुयुग' राहणारा असल्यामुळें
याचें याजकपण अढळ आहे. २५ ह्यामुळें याच्या द्वारें
देवाजवळ जाणाऱ्यांस हा पूर्णपणें तारण्यास समर्थ आहे;
कारण त्यांच्यासाठीं मध्यस्थी करण्यास हा सर्वदा
जीवंत आहे.

२६ असाच प्रमुख याजक आपल्याला असणें योग्य
होतें; तो पवित्र, सात्विक, निर्मळ, पापी जनांपासून वेगळा
व आकाशाहून उंच करण्यांत आलेला असा आहे. २७ त्याला
त्या प्रमुख याजकांप्रमाणें पहिल्यानें स्वतःच्या पापांसाठीं, मग
लोकांच्या पापांसाठीं, प्रतिदिवशीं यज्ञ करण्याचें अगत्य
नाहीं; कारण त्यानें स्वतःला अर्पिल्यानें तें अर्पण एकदाच
करून ठेविलें आहे. २८ नियमशास्त्र दुर्बळ असा मनुष्यांस
प्रमुख याजक नेमितें; पण नियमशास्त्रानंतरच्या शपथेचें
वचन 'युगानुयुग' परिपूर्ण केलेल्या 'पुत्राला' नेमितें.

## यहूद्यांच्या याजकपणापेक्षा ख्रिस्ताचें याजकपण श्रेष्ठ

८ १ आमच्या सांगण्याचा सारांश हा आहे कीं
स्वर्गामध्यें राजाधिराज जो ईश्वर त्याच्या राजासनाच्या
'उजवीकडे बसलेला' असा प्रमुख याजक आपल्याला
आहे. २ तो पवित्रस्थानाचा व मनुष्यानें नव्हे तर 'प्रभूनें
घातलेल्या खऱ्या मंडपाचा' सेवक आहे. ३ प्रत्येक प्रमुख
याजक दानें व यज्ञपशु हीं अर्पावयास नेमिलेला असतो;
यास्तव त्याजवळहि अर्पिण्यास कांहीं तरी असणें अगत्य
आहे. ४ तो जर पृथ्वीवर असता तर याजकच नसता;
कारण नियमशास्त्राप्रमाणें दानें अर्पिणारे याजक आहेत;
५ ते स्वर्गीय वस्तूंची प्रतिमा व छाया यांची सेवा करि-
तात; त्याप्रमाणें मोशेहि मंडप करणार होता, तेव्हां त्याला
ईश्वरी आदेश मिळाला; त्यांत, पर्वतावर तुला दाखविलेल्या
नमुन्याप्रमाणें सर्व वस्तु बनविण्याची सावधगिरी ठेव, असें
तो म्हणतो. ६ आतां ज्यापेक्षां अधिक चांगल्या वचनांनीं
स्थापिलेल्या अधिक चांगल्या कराराचा मध्यस्थ तो आहे,
त्यापेक्षां तितकी अधिक श्रेष्ठ सेवा त्यास मिळाली आहे.
७ कारण तो पहिला करार निर्दोष असता, तर दुसऱ्या-
करितां ठिकाण शोधण्यांत आलें नसतें. ८ लोकांस दोष
लावून तो म्हणतो :

परमेश्वर म्हणतो, पाहा, असे दिवस येत आहेत कीं
त्यांत इस्राएलचें घराणें व यहूदाचें घराणें यांच्या-
बरोबर मी नवा करार करीन;
९ मीं त्यांच्या पूर्वजांचा हात धरून त्यांस मिसर देशां-
तून बाहेर आणिलें.
तेव्हांच्या कराराप्रमाणें हा करार व्हावयाचा नाहीं;
कारण माझ्या कराराप्रमाणें ते राहिले नाहींत,
आणि मीं त्यांची उपेक्षा केली, असें प्रभु म्हणतो.
१० तर परमेश्वर म्हणतो, त्या दिवसांनंतर इस्राएल-
च्या घराण्याशीं जो करार मी करीन तो हा :
मी आपले नियम त्यांच्या अंतर्यामीं ठेवीन,
आणि ते त्यांच्या हृदयपटांवर लिहीन,
आणि मी त्यांना देव असा होईन,
आणि ते मला माझे लोक असे होतील;
११ तेव्हां
प्रत्येक जण आपल्या ग्रामबंधूस,
प्रत्येक जण आपल्या बंधूस,
परमेश्वराला ओळखा, असा बोध करणार नाहीं;
कारण त्यांतील लहानापासून थोरापर्यंत,
ते सर्व मला ओळखतील;
१२ कारण त्यांतील अधर्माविषयीं क्षमाशील होईन,
आणि त्यांचीं पापें मी यापुढें स्मरणार नाहीं.
१३ त्यानें 'नवा' असें म्हटल्यानें पहिल्याला जुनें
केलें आहे; आणि जें जुनें व जीर्ण होत आहे तें
नाहींसें होण्याच्या लागास आलें आहे.

## जुनें पवित्रस्थान नव्या पवित्रस्थानाचें दर्शक आहे

९ १ पहिल्या करारांतहि उपासनेचे विधि होते
व पवित्रस्थान होतें; पण तें पार्थिव होतें. २ कारण
पहिला मंडप तयार केलेला होता त्यांत दिव्याची
समई, मेज व समर्पित भाकरी होत्या; त्याला पवित्रस्थान

म्हटलें आहे; ३ आणि दुसऱ्या पडद्याच्या पलीकडे परम-
पवित्रस्थान म्हटलेला मंडप होता; ४ त्यांत सोन्याचें धुपा-
टणें व सोन्यानें सभोंवतीं मढविलेला कराराचा कोश
होता; या कोशांत मान्ना ठेवलेलें सुवर्णपात्र, कळ्या
आलेली अहरोनाची काठी, व कराराच्या पाट्या हीं
होतीं; ५ आणि त्याच्यावर गौरवशाली करूबीम दया-
सनावर छाया करीत होते; यांविषयीं आतां सविस्तर
सांगण्याचें प्रयोजन नाहीं. ६ या वस्तूंची अशी व्यवस्था
केलेली असतां याजक उपासना करण्यास पहिल्या
मंडपांत नित्य जात असतात; ७ दुसऱ्यांत प्रमुख याजक
मात्र वर्षांतून एकदां स्वतःबद्दल व लोकांच्या अज्ञानानें
झालेल्या पापांबद्दल जें रक्त अर्पण करावयाचें तें घेऊन
जातो, त्यावांचून जात नाहीं. ८ तेणेंकरून पवित्र
आत्मा दर्शवितो कीं जोंपर्यंत पहिला मंडप उभा आहे
तोंपर्यंत परमपवित्रस्थानाची वाट प्रकट होत नाहीं;
९ तो मंडप वर्तमानकाळीं दृष्टांतरूप आहे; त्याच्या
व्यवस्थेप्रमाणें उपासकाचा विवेकभाव पूर्ण करावयास
समर्थ नाहींत अशीं दानें व यज्ञपशु अर्पण करण्यांत
येतात; १० खाणें, पिणें, नाना प्रकारचीं क्षालनें यांसुद्धां
तीं अर्पणें, केवळ दैहिक विधि असे होते, ते सुधा-
रणुकीच्या काळापर्यंत लावून दिले होते.

## ख्रिस्तानें केलेल्या स्वार्पणाच्या ठायीं असलेलें शुद्धिकारक सामर्थ्य

११ ख्रिस्त हा भावी चांगल्या गोष्टींसंबंधी प्रमुख
याजक असा येऊन, हातांनीं केलेला नाहीं, म्हणजे
या सृष्टींतला नाहीं असा अधिक मोठ्या व पूर्ण मंडपांतून,
१२ आणि बकरे व गोऱ्हे यांचें रक्त नव्हे, तर आपलें
रक्त घेऊन एकदाच परमपवित्रस्थानांत गेला, आणि त्यानें
सार्वकालिक मुक्ति मिळविली. १३ कारण बकऱ्यांचें व
बैलांचें रक्त आणि विटाळलेल्यांवर शिंपडलेली कालवडीची
राख हीं जर देहाची शुद्धि होईल असें पवित्र
करितात, १४ तर सार्वकालिक आत्म्याच्या योगें ज्यानें
निष्कलंक अशा स्वतःस देवाला अर्पण केलें त्या ख्रिस्ताचें रक्त
तुमचा विवेकभाव जीवंत देवाच्या सेवेसाठीं निर्जीव
कर्मांपासून किती विशेषेंकरून शुद्ध करील? १५ आणि
तो याचकरितां नव्या कराराचा मध्यस्थ आहे कीं
पहिला करार चालू असतां जीं उल्लंघनें झालीं,
त्यांपासून मुक्ति होण्यासाठीं मरण झाल्यानें, सार्वकालिक
वारशाचें वचन पाचारण झालेल्यांस मिळावें. १६ कारण
जेथें मृत्युपत्र आहे तेथें मृत्युपत्रकर्त्याचा मृत्यु सिद्ध
होणें अवश्य आहे. १७ मृत्यु झाल्यावर मृत्युपत्र
अमलांत येतें; कारण मृत्युपत्रकर्ता जीवंत आहे तोंपर्यंत
तें कधी चालावयाचें नाहीं. १८ यास्तव पहिल्या करा-
राचीहि स्थापना रक्तावांचून झाली नाहीं. १९ मोशानें
नियमशास्त्राप्रमाणें सर्व आज्ञा सर्व लोकांस सांगितल्यावर,
पाणी, किरमिजी लोकर व एजोब यांसह गोऱ्ह्यांचें व
बकऱ्यांचें रक्त घेऊन पुस्तकावर व सर्व लोकांवरहि सिंचन
करीत म्हटलें: २० 'जो करार देवानें आज्ञा करून
तुम्हांसाठीं दिला त्याचें हें रक्त आहे;' २१ आणि त्यानें
तसेंच मंडप व सेवेचीं सर्व पात्रें यांवर रक्त शिंपडिलें. २२
नियमशास्त्राप्रमाणें रक्तानें सर्व शुद्ध होतात, आणि रक्तपाता-
वांचून पापमोचन होत नाहीं, असें म्हटलें असतां
चालेल.

## ख्रिस्ताच्या स्वार्पणाचें अनन्यत्व

२३ याप्रमाणें स्वर्गांतील वस्तूंचे नमुने अशानें शुद्ध
होणें अवश्य होतें; स्वतः स्वर्गीय वस्तु तर यांहून
चांगल्या यज्ञांनीं शुद्ध होणें अवश्य होतें. २४ खऱ्या
गोष्टीच्या नमुन्यासारखें हातांनीं केलेलें पवित्रस्थान
यांत ख्रिस्त गेला नाहीं, तर आपल्यासाठीं देवासन्मुख
उभा राहण्यास स्वर्गांत गेला; २५ आणि जसा प्रमुख
याजक प्रतिवर्षीं दुसऱ्याचें रक्त घेऊन परमपवित्र-
स्थानांत जातो, तसा तो स्वतःला वारंवार अर्पण
करावयास गेला नाहीं; २६ तो गेला असता तर
जगाच्या स्थापनेपासून त्याला वारंवार दुःख सोसावें
लागलें असतें; पण तो युगांच्या समाप्तीस स्वतःच्या
यज्ञानें पापें नाहींतशीं करण्यासाठीं एकदाच प्रकट झाला
आहे. २७ ज्या अर्थीं मनुष्यांस एकदाच मरणें, व
त्यानंतर न्याय होणें नेमून ठेविलें आहे, २८ त्याअर्थी
ख्रिस्त 'बहुतांचीं पापें स्वतःवर घेण्यास' एकदाच
अर्पिला गेला; आणि जे त्याची वाट पाहतात त्यांस

तारणासाठीं पापविरहित असा दुसऱ्यानें दिसेल.

### ख्रिस्ताचा आत्मयज्ञ मोशानें लावून दिलेले यज्ञमार्ग रद्द करतो

१ तर मग ज्या भावी चांगल्या गोष्टी
१० आहेत त्यांची छाया नियमशास्त्रांत आहे, त्या
गोष्टींचें वास्तविक स्वरूप त्यांत नाहीं; म्हणून
देवाजवळ येणाऱ्यास प्रतिवर्षी निरंतर अर्पिलेल्या त्याच
यज्ञांनीं पूर्ण करण्यास तें कधींहि समर्थ असत नाहीं. २
तें समर्थ असतें तर एकदा शुद्ध झालेल्या उपासकांस
यापुढें पापभाव नसल्यानें तें यज्ञ करणें बंद झालें नसतें
काय ? ३ परंतु ते यज्ञ वर्षानुवर्षे पापांची आठवण देतात.
४ कारण बैलांचें व बकऱ्यांचें रक्त ह्याच्या योगें पापें दूर
व्हावीं हें अशक्य आहे. ५ यास्तव तो जगांत येतेवेळेस
म्हणाला,

यज्ञपशु व अन्नार्पण यांची तुला इच्छा नाहीं,
तूं माझ्यासाठीं शरीर तयार केलें आहे;
६ होमांनीं व पापाबद्दलच्या अर्पणांनीं तुला संतोष
झाला नाहीं;
७ यावरून मी म्हणालों, पाहा, हे देवा,
ग्रंथपटांत मजविषयीं लिहून ठेविलें आहे,
तुझ्या इच्छेप्रमाणें करावयासाठीं मी आलों आहें.

८ वर उल्लेखिल्याप्रमाणें आरंभीं तो म्हणाला, 'यज्ञपशु,
अन्नार्पणें, होम व पापाबद्दलचीं अर्पणें, यांची इच्छा
तुला नाहीं, व त्यांत तुला संतोष नाहीं;' ( नियम-
शास्त्राप्रमाणें जीं अर्पिण्यांत येतात तीं हीं; ) ९ आणि
मग म्हणाला, 'पाहा, मी तुझ्या इच्छेप्रमाणें करावयास
आलों आहें.' यांत दुसरें स्थापण्यास तो पहिलें नाहींसें
करितो. १० त्या 'इच्छेनें' आपण येशू ख्रिस्ताच्या
'शरीराच्या' एकदाच झालेल्या 'अर्पणाच्या' द्वारें
पवित्र केलेले आहों. ११ प्रत्येक याजक प्रतिदिवशीं
सेवा करीत आणि जे यज्ञ पापें दूर करावयाला कदापि
समर्थ नाहींत तेच ते वारंवार करीत उभा असतो;
१२ परंतु हा पापांबद्दल सार्वकालिक असा एकच यज्ञ
अर्पून 'देवाच्या उजवीकडे बसला आहे;' १३ आणि
तेव्हांपासून 'आपले वैरी आपलें पादासन होत'
तोंपर्यंत वाट पाहत आहे. १४ पवित्र होणाऱ्यांस
त्यानें एका अर्पणानें सर्वकाळचें पूर्ण केलें आहे. १५
पवित्र आत्माहि आपल्याला साक्ष देतो, ती अशी:
१६ परमेश्वर म्हणतो, त्या दिवसांनंतर जो करार मी
त्यांबरोबर करीन तो हा:

मी आपले नियम त्यांच्या अंतर्यामीं ठेवीन,
आणि ते त्यांच्या हृदयपटांवर लिहीन.
१७ असें म्हटल्यावर तो म्हणतो,
आणि त्यांचीं पापें व त्यांचे अधर्म
मी यापुढें स्मरणार नाहीं.
१८ तर मग जेथें त्यांची क्षमा झाली तेथें पापाबद्दल
अर्पण नको.

### उत्तेजन व इशारा

१९,२० बंधुजनहो, त्यानें पडद्यांतून म्हणजे स्वदे-
हांतून जो नवीन व जीवनयुक्त मार्ग आपल्यासाठीं स्थापित
केला त्या मार्गानें, परमपवित्रस्थानांत येशूच्या रक्ताद्वारें
प्रवेश करण्याचें आपल्याला धैर्य आहे; २१ आणि
आपल्याकरितां 'देवाच्या घराबर एक थोर याजक आहे;'
२२ म्हणून आपलीं हृदयें सिंचित झाल्यानें दुष्ट विवेक-
भावनेपासून मुक्त झालेले व निर्मळ पाण्यानें शरीर
धुतलेले असे आपण खऱ्या अंतःकरणानें व विश्वासाच्या
पूर्ण खातरीनें जवळ यावें. २३ आपल्या आशेची कबुली
अढळ राखावी; कारण ज्यानें वचन दिलें तो विश्वस-
नीय आहे; २४ आणि प्रीति व सत्कर्में करावयास उत्तेजन
येईल असें एकमेकांकडे लक्ष द्यावें. २५ आपण कित्ये-
कांच्या चालीप्रमाणें आपलें एकत्र मिळणें सोडूं नये, तर
एकमेकांस बोध करावा; आणि तो दिवस जवळ येत
आहे हें तुम्ही पाहतां, म्हणून विशेषेंकरून करावा.

२६ कारण सत्याचें ज्ञान मिळाल्यावर आपण जाणून-
बुजून पाप केलें तर पापांबद्दल यापुढें यज्ञ व्हावयाचा
राहिला नाहीं; २७ न्याय होण्याची भयंकर अशी
मार्गप्रतीक्षा, आणि 'विरोध्यांस खाऊन टाकील असा
अग्निप्रकोप' हीं कायतीं राहतात. २८ मोशाचें नियम-
शास्त्र कोणी तुच्छ मानिलें तर त्याजवर दया न होतां
त्याला 'दोघांच्या किंवा तिघांच्या साक्षीवरून मरणदंड

होतो;’ २९ तर ज्यानें देवाच्या पुत्राला पायाखालीं
तुडविलें, ज्येणेंकरून तो स्वतः पवित्र झाला होता तें
‘करारार्चें रक्त’ अपवित्र मानिलें, आणि कृपेच्या
आत्म्याचा अपमान केला तो किती अधिक कठीण
दंडास पात्र ठरेल म्हणून तुम्हांस वाटतें? ३० ‘सूड
घेणें मजकडे आहे, मी फेड करीन’ असें ज्यानें म्हटलें
व पुनः, ‘प्रभु आपल्या लोकांचा न्याय करील,’ असें
म्हटलें तो आपल्याला माहीत आहे. ३१ सदाजीवी
देवाच्या हातीं सांपडणें हें भयंकर आहे.

## धैर्य सोडूं नये म्हणून बोध

३२ तुम्हीं पूर्वकाळचे दिवस आठवा; त्यांमध्यें तुम्हांस
प्रकाश मिळाल्यावर तुम्हीं दुःखाबरोबर फार धीरानें झोंबी
चालविली; ३३ कधीं निंदा व संकटें सोसल्यानें तुम्ही
लोकांस तमाशा झालां; कधीं अशी दशा झालेल्या
लोकांचे विभागी झालां; ३४ म्हणजे बंदिवानांबरोबर
तुम्ही समदुःखी झालां, आणि आपली स्वतःची अधिक
चांगली मालमत्ता आपल्याजवळ आहे, व ती टिकाऊ
आहे, असें समजून तुम्हीं आपल्या मालमत्तेची हानि
आनंदानें स्वीकारली. ३५ यास्तव आपलें धैर्य सोडूं
नका, त्यापासून मोठें प्रतिफळ आहे. ३६ तुम्हांस
सहनतेचें अगत्य आहे, यासाठीं कीं तुम्हीं देवाच्या
इच्छेप्रमाणें वागून वचनफळ प्राप्त करून घ्यावें.
३७ कारण अगदीं थोडा वेळ राहिला आहे;
जो येणार तो येईल, उशीर करणार नाहीं;
३८ माझा नीतिमान् पुरुष विश्वासानें वांचेल;
तो जर माघार घेईल, तर त्याजविषयीं माझ्या
जिवाला संतोष वाटणार नाहीं.
३९ नाश होईल अशी ‘माघार घेणाऱ्यांपैकीं’ आपण
नाहीं; तर जिवाच्या तारणासाठीं ‘विश्वास धरणाऱ्यांपैकीं’
आहों.

## श्रद्धेच्या सामर्थ्याचीं उदाहरणें

१ विश्वास हा अपेक्षित गोष्टींविषयींचा भरवसा
११ आणि न दिसणाऱ्या गोष्टींबद्दलची खातरी असा
आहे. २ याविषयीं वडील नांवाजलेले होते.
३ विश्वासानें आपल्याला कळतें कीं देवाच्या शब्दानें
विश्वरचना झाली, अशी कीं जें दिसतें तें दृश्य वस्तूं-
पासून झालें नाहीं. ४ हाबेलानें काइनापेक्षां चांगला यज्ञ
विश्वासानें देवाला अर्पिला, तेणेंकरून तो नीतिमान् आहे
अशी त्याजविषयीं साक्ष झाली, ती ‘दानप्रसंगीं देवानें’
दिली; आणि तो मेला असतांहि त्या विश्वासाच्या द्वारें
अद्यापि बोलतो. ५ मरणानुभव येऊं नये म्हणून विश्वा-
सानें हनोखाला लोकांतरीं नेण्यांत आलें; ‘तो सांपडला
नाहीं; कारण त्याला देवानें लोकांतरीं नेलें;’ लोकांतर
होण्यापूर्वी त्याविषयीं साक्ष झाली कीं, ‘तो देवाला
संतोषवीत असे;’ ६ आणि विश्वासावांचून त्याला
संतोषविणें अशक्य आहे; कारण देवाजवळ जाणाऱ्यानें
असा विश्वास धरिला पाहिजे कीं तो आहे, आणि त्याजकडे
धाव घेणाऱ्यांला तो प्रतिफळ देणारा होतो. ७ जें आज-
पर्यंत पाहण्यांत आलें नव्हतें त्याविषयीं ईश्वरी संदेश
नोहानें ऐकला आणि भक्तिभाव धरून आपल्या घराच्या
तारणासाठीं विश्वासानें तारूं तयार केलें; त्या विश्वासाच्या
द्वारें त्यानें जग दोषी ठरविलें, आणि विश्वासानें जें
नीतिमत्व त्याचा तो वतनदार झाला. ८ अब्राहामाला
पाचारण झाल्यावर जें ठिकाण त्याला वतन असें मिळणार
होतें त्यांत ‘निघून जाण्यास’ तो विश्वासानें मान्य झाला;
आणि आपण कोठें जातों हें ठाऊक नसतांहि तो निघून
गेला. ९ विश्वासानें तो वचनाच्या देशांत परदेशांत
राहावें त्याप्रमाणें जाऊन राहिला; त्याच वचनाचे सोबती
वारीस इसहाक व याकोब यांजबरोबर डेऱ्यांत त्याची
वस्ती होती; १० कारण ज्याला पाये आहेत, ज्याचा
योजणारा व बांधणारा देव आहे अशा नगराची तो वाट
पाहत होता. ११ विश्वासानें सारेला देखील, ती काळाच्या
मर्यादेपलीकडे असतांहि, वंशस्थापनेची शक्ति मिळाली,
कारण तिनें वचन देणाऱ्यास विश्वसनीय मानिलें. १२ त्या-
मुळें एकापासून, आणि तोहि निर्जीव झालेला अशापासून,
संख्येनें ‘आकाशांतल्या ताऱ्यांसारखी, व समुद्रकांठावरील
वाळूसारखी अगणित,’ इतकी संतति निर्माण झाली.

१३ हे सर्व विश्वास धरून मेले; त्यांस वचनफळें
मिळालीं नव्हतीं, तर त्यांनी तीं दुरून पाहिलीं व त्यांचें
वंदन केलें, आणि आपण ‘पृथ्वीवर परके व प्रवासी’

आहों असें बोलून दाखविलें. १४ असें म्हणणारे आपण स्वतःच्या देशाचा शोध करीत आहों असें दाखवितात. १५ ज्या देशांतून ते निघाले त्या देशाला उद्देशून हें म्हणणें असतें तर त्यांस परत जाण्यास प्रसंग होता; १६ पण ते अधिक चांगल्या देशाची म्हणजे स्वर्गीय देशाची उत्कंठा धरितात; यामुळें देवाला त्यांची लाज वाटत नाहीं; त्यांचा देव म्हणवयास तो लाजत नाहीं; त्यानें त्यांच्यासाठीं नगर तयार केलें आहे.

१७ ‘अब्राहामानें आपल्या परीक्षेंत’ विश्वासानें ‘इसहाकाचें अर्पण केलें;’ ज्यानें वचनें स्वीकारिलीं होतीं त्यानें आपल्या ‘एकुलत्या एक पुत्राचें’ अर्पण केलें; १८ त्याला असें सांगितलें होतें कीं ‘इसहाकापासून तुझ्या नांवाचा वंश चालेल;’ १९ तेव्हां मेलेल्यांतून देखील उठवावयास देव समर्थ आहे, असें त्यानें लक्षांत आणिलें आणि त्या स्थितींतून उपमेनें तो त्याला परत मिळाला. २० इसहाकानें याकोबाला व एसावाला भावी गोष्टींविषयीं विश्वासानें आशीर्वाद दिला. २१ याकोबानें मरतेवेळेस योसेफाच्या प्रत्येक पुत्राला विश्वासानें आशीर्वाद दिला; आणि ‘आपल्या काठीच्या टोकावर टेकून नमन केलें.’ २२ योसेफानें मरतेवेळेस इस्राएलाच्या संतानाच्या निर्गमाची विश्वासानें सूचना केली व आपल्या अस्थींविषयीं आज्ञा केली. २३ मोशे जन्मल्यावर त्याच्या आईबापांनीं विश्वासानें त्याला ‘तीन महिने लपवून ठेविलें,’ कारण तो मूल ‘सुंदर आहे असें त्यांनीं पाहिलें;’ व त्यांस राजाज्ञेचें भय वाटलें नाहीं. २४ मोशानें प्रौढ झाल्यावर आपणास फारोच्या कन्येचा पुत्र म्हणविण्याचें विश्वासानें नाकारिलें; २५ पापाचें क्षणिक सुख भोगणें यापेक्षां देवाच्या लोकांबरोबर दुःख भोगणें हें त्यानें पसंत करून घेतलें; २६ ख्रिस्ताचा अपमान सोसणें ही मिसर देशाच्या धननिधींपेक्षां उत्तम संपत्ति आहे असें त्यानें गणिलें; कारण त्याची दृष्टि प्रतिफळावर होती. २७ त्यानें राजाच्या क्रोधाला न भितां विश्वासानें मिसर देश सोडिला; कारण जो अदृश्य आहे त्याला जणू काय पाहत असल्यासारखा त्यानें धीर धरिला. २८ त्यानें ‘वल्हांडण सण’ व ‘रक्तसिंचन’ हे विधि विश्वासानें पाळिले, यासाठीं कीं प्रथम जन्मलेल्या वत्सांचा ‘नाश करणाऱ्यानें’ त्यांस शिवूं नये. २९ जसे कोरड्या भूमीवरून तसे ते विश्वासानें तांबड्या समुद्रांतून पार गेले; मिसरी लोक तसेंच करण्याचा प्रयत्न करीत असतां बुडून गेले. ३० विश्वासानें यरीहोच्या गांवकुसाभोंवतीं सात दिवसपर्यंत फेऱ्या घातल्यावर तें पडलें. ३१ विश्वासानें रहाब कसबिणीचा, तिनें हेरांचा स्वीकार स्नेहभावानें केल्यामुळें, अवज्ञा करणाऱ्यांबरोबर नाश झाला नाहीं.

३२ आणखी काय सांगूं? गिदोन, बाराक, शमशोन, इफताह, दावीद, शमुवेल व संदेष्टे, यांचें वर्णन करूं लागलों तर वेळ पुरणार नाहीं. ३३ त्यांनीं विश्वासाच्या द्वारें राज्यें जिंकलीं, धार्मिकतेचें वर्तन केलें, वचनें मिळविलीं, सिंहांचीं तोंडें बंद केलीं, ३४ अग्नीची शक्ति नाहींशी केली; ते तरवारीच्या धारेपासून निभावले, ते दुर्बळांचे सबळ झाले, लढाईंत पराक्रमी झाले, त्यांनीं परक्यांचीं सैन्यें पळविलीं. ३५ स्त्रियांनां त्यांचीं मृत माणसें पुनरुत्थानानें जीवंत झालेलीं अशीं मिळालीं. कित्येकांनीं आपणांस अधिक चांगलें पुनरुत्थान प्राप्त व्हावें म्हणून सुटका न स्वीकारितां मरण्याइतक्या यातना सोसल्या; ३६ आणि इतरांस टवाळ्या, मारहाण यांचा आणि बंधनें व कैद यांचाहि अनुभव आला; ३७ त्यांस दगडमार केला, करवतीनें चिरिलें, मोहपाशांत टाकिलें, ते तरवारीच्या धारेनें मेले; ते मेंढरांचीं व शेरडांचीं कातडीं पांघरून फिरत असत; ते लाचार, पीडित, त्रासलेले, असे होते; ३८ त्यांस जग योग्य नव्हतें; ते अरण्यांतून, डोंगरांतून, गुहांतून व भूमीच्या कपारींतून भटकत राहत असत. ३९ या सर्वांविषयीं त्यांच्या विश्वासानें चांगली साक्ष दिली असतांहि त्यांस वचनफळ प्राप्त झालें नाहीं, ४० देवानें जें उत्तम तें आपणांसाठीं पूर्वींच नेमिलें होतें, यासाठीं कीं त्यांनीं आपणांवांचून पूर्ण होऊं नये.

## श्रद्धेचें प्रमुख उदाहरण म्हणजे येशू

१२ १ तर मग आपण आपल्या इतक्या साक्षीरूपी मेघानें वेढिलेले आहों म्हणून आपणहि सर्व दडपण व सहज गुंतविणारें पाप टाकून, आपल्याला नेमून दिलेल्या धांवेवरून धीरानें धांवावें; २ आपण आपल्या विश्वासाचा उत्पादक व पूर्ण करणारा येशू याजकडे

पाहत असावें; त्याजपुढें जो आनंद ठेविलेला होता त्याकरितां त्यानें लज्जा तुच्छ मानून वधस्तंभ सहन केला, आणि तो देवाच्या राजासनाच्या उजवीकडे बसला आहे. ३ ज्यानें 'आपणांविरुद्ध पाप करणाऱ्यांनीं' केलेला इतका विरोध सहन केला त्याची तुलना करा, म्हणजे तुमचीं मनें खचून धीर सुटणार नाहीं.

## शिस्तीचा हेतु

४ तुम्ही पापाबरोबर युद्ध करीत असतां रक्तपात होण्याइतका प्रतिकार अजून केला नाहीं; ५ जो बोध पुत्रांला करावयाचा तसा तुम्हांला केला तो तुम्ही विसरलां आहां काय?

माझ्या मुला, प्रभूच्या शिक्षेचा अनादर करूं नको,
आणि त्याजकडून दोष पदरीं पडला असतां तूं खचूं नको;
६ कारण ज्याच्यावर प्रभु प्रीति करितो, त्याला तो शिक्षा करितो आणि ज्या पुत्रांना तो स्वीकारितो त्या प्रत्येकाला फटके मारितो.

७ 'शिक्षणासाठीं' तुम्ही सहन करीत आहां; देव पुत्रांबरोबर तसा तुम्हांबरोबर वागतो; ज्याला बाप शिक्षा करीत नाहीं असा कोण पुत्र आहे? ८ ज्या शिक्षेचे भागीदार सर्व झाले आहेत अशा शिक्षेविरहित तुम्ही जर आहां तर तुम्ही पुत्र नव्हां, दासीपुत्र आहां. ९ शिवाय शिक्षा करणारे असे आपल्या देहाचे बाप आपल्याला होते आणि आपण त्यांची भीड धरिली; तर आपण विशेषेंकरून जो जीवात्म्यांचा पिता त्याच्या अधीन होऊन जीवंत राहूं नये काय? १० कारण त्यांनीं मनास वाटली तशी थोडे दिवस शिक्षा केली; पण त्यानें केली ती आपल्या हितासाठीं, म्हणजे आपण त्याच्या पवित्रतेचे भागीदार व्हावें म्हणून केली. ११ कोणतीहि शिक्षा तत्कालीं आनंदाची वाटत नाहीं, खेदाची वाटते; तरी ज्यांस तिचा अभ्यास झाला त्यांस ती पुढें धार्मिकता हें शांतिकारक फळ देते. १२ यास्तव 'गलितहस्त व लटपटणारे गुडघे नीट करा,' १३ आणि 'आपल्या पायांसाठीं सरळ वाटा करा,' यासाठीं कीं लंगड्याचा संधिभंग होऊं नये तर उलटा तो बरा व्हावा.

## बोध व इशारे

१४ सर्वांबरोबर 'शांतीनें राहणें' व ज्यावांचून कोणास प्रभूचें दर्शन होत नाहीं असें पवित्रीकरण, 'यांच्या पाठीस लागा;' १५, १६ देवाच्या कृपेला कोणी अंतरूं नये, 'कोणी कडूपणाच्या मुळानें अंकुरित होऊन उपद्रव देऊं नये' व त्यामुळें पुष्कळांस विटाळ होईल तो होऊं नये; कोणी जारकर्मी असूं नये, किंवा ज्यानें एका जेवणासाठीं 'आपलें ज्येष्ठपण विकलें' त्या 'एसावा' सारखे कोणी ऐहिक बुद्धीचें असूं नये, याकडे लक्ष द्या. १७ तुम्हांला माहीत आहे कीं त्यानंतर तो वारशानें आशीर्वाद मिळविण्याची इच्छा करीत असतां त्याचा नाकार झाला; त्यानें जरी अश्रु आणून फार प्रयत्न केला तरी ( बापाचें ) मन वळविण्याचें त्याला साधलें नाहीं.

## ऐहिक सीयोन व स्वर्गीय सीयोन यांमधली तफावत

१८ स्पर्शज्ञेय व 'पेटलेला अग्नि, घनांधकार, निबिड काळोख, वादळ, १९ करण्याचा नाद व शब्दध्वनि,' यांजजवळ तुम्ही आलां नाहीं; ती वाणी ऐकणाऱ्यांनीं विनंति केली कीं तिच्यायोगें आम्हांबरोबर अधिक बोलणें होऊं नये; २० कारण 'पशु देखील डोंगराला शिवला तर त्यास धोंड्यांनीं मारावें,' अशी जी आज्ञा ती त्याच्यानें सोसवली नाहीं; २१ आणि जें दिसलें तें इतकें भयंकर होतें कीं मोशे म्हणाला, 'मी अति भयभीत व कंपित झालों आहें;' २२ पण तुम्ही सीयोन डोंगर, सदाजीवी देवाचें नगर स्वर्गीय यरुशलेम, लाखों देवदूत, २३ स्वर्गांतील यादींतल्या ज्येष्ठांचा समाज व मंडळी, सर्वांचा न्यायाधीश देव, पूर्ण केलेल्या नीतिमान् लोकांचे आत्मे, २४ नव्या कराराचा मध्यस्थ येशू, आणि शिंपडण्याचें रक्त यांजवळ आलां आहां; त्या रक्ताचें बोलणें हाबेलापेक्षां उत्तम आहे. २५ जो बोलत आहे त्याचा अवमान करूं नये म्हणून जपा; कारण पृथ्वीवर आज्ञा सांगणाऱ्याचा अवमान करणारे जर निभावले नाहींत, तर स्वर्गांतून आज्ञा सांगणाऱ्याचा अवमान करणारे आपण विशेषेंकरून निभावणार नाहीं. २६ त्या वेळेस त्याच्या वाणीनें पृथ्वी हालविली; आणि आतांच्याविषयीं त्यानें असें वचन दिलें आहे कीं 'आणखी

एकदा मी ' केवळ ' पृथ्वी ' नव्हे तर ' आकाशहि कांपवीन.' २७ ' आणखी एकदा ' या शब्दांनीं असा बोध होतो कीं घडविलेल्या वस्तूंप्रमाणें हालविलेल्या वस्तूंचें निःसारण होईल, म्हणजे न हालविलेल्या वस्तु राहाव्या. २८ यास्तव न हालणारें राज्य मिळणारे जे आपण ते उपकार मानूं; तेणेंकरून देवाला प्रिय होईल अशी त्याची सेवा सद्भक्तीनें व सद्भयानें करूं; २९ कारण आपला 'देव भस्म करणारा अग्निहि आहे.'

## व्यवहारोपयोगी बोध

**१३** १ बंधुप्रीति सदा राहो. २ अतिथिप्रेमाचा विसर पडूं देऊं नका; कारण तेणेंकरून कित्येकांनीं देवदूतांचें आतिथ्य न समजतां केलें आहे. ३ तुम्ही बंदिवानांबरोबर बंदांत आहां असें समजून त्यांची आठवण करा; आपणहि देहांत आहों म्हणून पीडितांची आठवण ठेवा; ४ लग्न सर्वस्वीं मान्य असावें व अंथरूण निर्दोष असावें; जारकर्मी व व्यभिचारी यांस देव दंड करील. ५ तुमची वागणूक द्रव्यलोभविरहित असावी; जवळ आहे तेवढ्यानें तुम्हीं तृप्त असावें; कारण त्यानें स्वतः म्हटलें आहे, ' मी तुला सोडणार नाहींच व तुला टाकणार नाहींच. ' ६ यास्तव आम्ही धैर्यानें म्हणतों :

परमेश्वर माझा साहाय्यकर्ता आहे, मी भिणार नाहीं; मनुष्य माझें काय करणार ?

## पुढाऱ्यांशीं निष्ठा

७ जे तुमचे अधिकारी होते, ज्यांनीं तुम्हांस देवाचें वचन सांगितलें, त्यांची आठवण करा; त्यांच्या वर्तणुकीचा परिणाम लक्षांत आणून त्यांच्या विश्वासाचें अनुकरण करा. ८ येशू ख्रिस्त काल, आज व युगानुयुग सारखाच आहे. ९ विचित्र व अन्यथा शिक्षणानें बहकून जाऊं नका; कारण ज्या विधींपासून पाळणाऱ्यांस लाभ झाला नाहीं अशा खाण्याच्या विधींनीं नव्हे, तर कृपेनें अंतःकरण स्थिर केलेलें असणें हें उत्तम. १० ज्या वेदीवरचें खाण्याचा अधिकार मंडपाची सेवा करणाऱ्यांस नाहीं, अशी वेदी आपल्याला आहे. ११ ज्या पशूंचें ' रक्त पापाबद्दल ' मुख्य याजकाच्या द्वारें ' पवित्रस्थानांत नेलें जातें ' त्यांचीं शरीरें तळाबाहेर जाळतात. १२ यास्तव येशूनेंहि स्वरुधिरानें लोकांस पवित्र करावें म्हणून वेशीबाहेर मरण सोशिलें, १३ तर आतां आपण त्याचा अपमान सोशीत त्याच्याजवळ ' तळाबाहेर ' जाऊ या. १४ कारण आपल्याला एथें स्थाईक नगर नाहीं; तर जें नगर होणार त्याची आपण वाट पाहतों. १५ यावरून आपण त्याच्याच द्वारें ' देवाला उपकारस्मरणरूपी यज्ञ ' निरंतर ' अर्पावा; ' हा यज्ञ त्याचें नाम स्वीकारणाऱ्या ' ओठांचें फळ ' असा आहे. १६ परोपकार व दानधर्म करणें विसरूं नका; कारण अशा यज्ञांनीं देव संतुष्ट होतो. १७ तुम्ही आपल्या अधिकाऱ्यांच्या आज्ञेंत राहा व त्यांच्या अधीन असा; कारण आपणांस हिशेब द्यावयाचा आहे असें समजून ते तुमच्या जिवांकरितां जागृत राहतात; हें त्यांनीं आनंदानें करावें, शोकानें करूं नये; हें शोकानें करणें तुम्हांस हितकारक नाहीं.

## शेवटचा संदेश

१८ आम्हांसाठीं प्रार्थना करा; आम्हांस भरवसा आहे कीं सर्व गोष्टींत चांगली वर्तणूक ठेवण्यास आमची इच्छा असून आमचा विवेकभाव चांगला आहे. १९ मीं तुम्हांस पुनः अधिक लवकर प्राप्त व्हावें म्हणून ती प्रार्थना करण्याची मी तुम्हांला विशेषतः विनंति करितों.

२० आतां ज्या शांतीच्या देवानें ' सर्वकाळच्या कराराच्या रक्तानें मेंढरांचा महान् मेंढपाळ,' आपला प्रभु येशू, याला मेलेल्यांतून माघारें आणिलें, २१ तो देव आपल्या दृष्टीनें जें आवडतें तें आपणामध्यें येशू ख्रिस्ताच्या द्वारें करो व आपल्या इच्छेप्रमाणें वागण्यास तुम्हांस प्रत्येक कामांत सिद्ध करो; त्याला युगानुयुग गौरव असो. आमेन.

२२ बंधूंनो, तुम्हांस विनंति करितों कीं हें बोधवचन शांतपणें सहन करा; कारण मीं थोडक्यांत लिहिलें आहे. २३ आपला बंधु तीमथ्य याची सुटका झाली हें तुम्हांस कळावें; तो लवकर आला तर त्याला बरोबर घेऊन मी तुमच्या भेटीस येईन.

२४ तुम्ही आपल्या सर्व अधिकाऱ्यांस व सर्व पवित्र जनांस सलाम सांगा.

इटालीहून आलेल्यांचे तुम्हांस सलाम.

२५ तुम्हां सर्वांस कृपा असो. आमेन.

# याकोबाचें पत्र



## निरनिराळ्या विषयांवर व्यवहार्य असा उपदेश

१ बारा वंशांतील पांगलेल्या लोकांस, देवाचा व
**१** प्रभु येशू ख्रिस्ताचा दास याकोब याचा सलाम.
२ माझ्या बंधूंनो, नाना प्रकारच्या संकटांनीं तुमची
परीक्षा होते तेव्हां तुम्ही केवळ आनंदच माना; ३ तुम्हांस
ठाऊक आहे कीं तुमच्या विश्वासाची परीक्षा उतरल्यानें
धीर उत्पन्न होतो; ४ आणि धीराला आपलें कार्य पूर्ण
करूं द्या, यासाठीं कीं तुम्हीं कशांतहि उणे न होतां सिद्ध
व परिपूर्ण व्हावें.
५ तुम्हांपैकीं जो कोणी ज्ञानानें उणा असेल त्यानें तें
देवाजवळ मागावें, म्हणजे तें त्याला मिळेल; कारण तो
कोणास दोष न लावितां सर्वांस दातृत्वानें देतो; ६ पण
त्यानें कांहीं संशय न धरितां विश्वासानें मागावें; संशय
धरणारा वाऱ्यानें लोटलेल्या व उचंबळलेल्या समुद्राच्या
लाटेसारखा आहे. ७, ८ असा मनुष्य दोन मनांचा असून
आपल्या सर्व मार्गांत चंचल असतो. आपणाला प्रभूपासून
कांहीं मिळेल असें त्यानें समजूं नये.
९ नीच स्थितींतील बंधूनें आपल्या उच्च स्थितीविषयीं
अभिमान बाळगावा. १० आणि धनवानानें आपल्या दीन
स्थितीविषयीं अभिमान बाळगावा; कारण तो ‘गवताच्या
फुलासारिखा’ नाहींसा होईल. ११ सूर्य तीव्र तेजानें
उगवला, त्यानें ‘गवत कोमेजविलें, त्याचें फूल गळालें,’
आणि त्याच्या रूपाची शोभा गेली; याप्रमाणें धनवानहि
आपल्या उद्योगाच्या भरांत कोमेजून जाईल.
१२ ‘जो’ मनुष्य परीक्षेंत ‘टिकतो तो धन्य,’ कारण
आपणावर प्रीति करणाऱ्यांस देवानें देऊं केलेला जीवनी
मुगूट परीक्षेस उतरल्यावर त्याला मिळेल. १३ कोणाची
परीक्षा होत असतां, देवानें मला मोहांत घातलें, असें
त्यानें म्हणूं नये; कारण देवाला वाईट गोष्टींचा मोह होत
नाहीं आणि तो स्वतः कोणाला मोहांत पाडीत नाहीं; १४
तर प्रत्येक मनुष्य आपल्या वासनेनें ओढलेला व भुल-
विलेला असा मोहांत पडतो. १५ मग वासना गर्भवती
होऊन पापाला जन्म देते; आणि पाप परिपक्व झाल्यावर
मरणास उपजविते. १६ माझ्या प्रिय बंधूंनो, फसूं नका;
१७ प्रत्येक उत्तम देणगी व प्रत्येक पूर्ण दान वरून आहे;
तें ज्याला विकार नाहीं व जो फिरण्यानें छायेंत जात नाहीं
अशा प्रकाशाच्या पित्यापासून उतरतें. १८ त्यानें आपल्या
इच्छेनें आपल्याला सत्य वचनानें जन्म दिला, यासाठीं कीं
आपण त्याच्या सृष्ट वस्तूंतील जसें काय प्रथम फळ व्हावें.

## खरें धर्माचरण

१९ माझ्या प्रिय बंधूंनो, तुम्हांस हें कळतें. यास्तव
प्रत्येक मनुष्य ऐकावयास शीघ्र, बोलावयास सावकाश,
रागास मंद असा असावा; २० कारण मनुष्याच्या रागानें
देवाच्या न्याय्यत्वाचें कार्य घडत नाहीं. २१ यास्तव सर्व
मलिनता व उचंबळून आलेला वैरभाव सोडून, तुमच्या
जिवाचें तारण करावयास समर्थ असें मुळाविलेलें वचन
सौम्यतेनें स्वीकारा. २२ वचनाप्रमाणें आचरण करणारे
असा, केवळ ऐकणारे असूं नका; अशानें तुमची भुलव-
णूक होते. २३ कारण जर कोणी वचन नुसतें ऐकून
त्याप्रमाणें कृति करीत नाहीं तर तो आरशांत आपलें
शारीरिक मुख पाहणाऱ्या मनुष्यासारखा आहे; २४ तो
स्वतःला पाहून तेथून निघून जातो; आणि आपण कसे
होतों हें तेव्हांच विसरतो; २५ परंतु स्वातंत्र्याच्या पूर्ण
नियमांवर नजर टाकून जो त्याकडे लक्षपूर्वक पाहत राहतो
तो ऐकून विसरणारा असा न होतां कृति करणारा होतो
व आपल्या करण्यांत धन्यता मिळवितो. २६ मी धर्मा-
चरण करणारा आहें. असें कोणाला वाटत असून तो आपल्या
जिभेला आळा घालीत नाहीं, आणि आपल्या मनाची भूल
करून घेतो तर त्याचें धर्माचरण व्यर्थ आहे. २७ देवपिता
याच्या दृष्टीनें शुद्ध व निर्मळ धर्माचरण म्हणजे अनाथ व
विधवा यांचा त्यांच्या संकटांत समाचार घेणें, व स्वतःला
जगाच्या कलंकापासून राखणें हें आहे.

## श्रीमंत व गरीब यांजशीं वागणूक

१ माझ्या बंधूंनो, गौरवशाली प्रभु म्हणजे
**२** आपला प्रभु येशू ख्रिस्त ह्याजवर विश्वास ठेवणाऱ्या
तुम्हांमध्यें तोंड पाहून वागणें असूं नये. २ सोन्याची
आंगठी घातलेला व भडक वस्त्रें ल्यालेला असा एकादा
मनुष्य तुमच्या सभास्थानांत आला, आणि भिकार वस्त्रें
पांघरलेला एक दरिद्रीहि आला; ३ तुम्ही भडक वस्त्रें
ल्यालेल्या इसमाकडे नजर लावून म्हणतां, ही चांगली
जागा आहे, एथें बसा; आणि दरिद्र्याला म्हणतां, तूं एथें
उभा राहा, किंवा माझ्या पादासनाजवळ खालीं बैस; ४
तर तुम्ही भ्रांतींत पडलां कीं नाहीं? आणि दुर्विचार बाळग-
णारे न्यायाधीश तुम्ही झालां कीं नाहीं? ५ माझ्या प्रिय
बंधूंनो, ऐका; लोकदृष्टीनें जे दरिद्री त्यांस विश्वासासंबंधानें
धनवान होण्यास आणि जें राज्य देवानें आपणावर प्रीति
करणाऱ्यांस देऊं केलें त्याचे वारीस होण्यास त्यानें निव-
डलें आहे कीं नाहीं? ६ पण तुम्हीं दरिद्र्याचा अपमान
केला आहे. धनवान् लोक तुम्हांवर जुलूम करितात कीं
नाहींत? आणि तेच तुम्हांस न्यायसभांत ओढून नेतात कीं
नाहींत? ७ ज्या उत्तम नामावरून तुम्हांस नांव मिळालें
आहे त्याची ते निंदा करितात कीं नाहीं? ८ तथापि, 'तूं
आपल्यासारखी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर,' ह्या शास्त्र-
लेखांतील राजमान्य नियम तुम्ही पूर्ण पाळितां तर बरें
करितां; ९ परंतु जर तुम्ही तोंड पाहून वागतां तर पाप करितां,
आणि नियमशास्त्राचें उल्लंघन करणारे असे दोषी ठरतां.
१० जो कोणी संपूर्ण नियमशास्त्र पाळून एका नियमाविषयीं
चुकतो तो सर्वांविषयीं दोषी होतो. ११ 'व्यभिचार करूं
नको,' असें ज्यानें सांगितलें त्यानेंच, 'नरहिंसा करूं नको,'
हेंहि सांगितलें. तूं व्यभिचार न करितां नरहिंसा करितोस
तरी नियमशास्त्र उल्लंघणारा होतोस. १२ स्वतंत्रतेच्या निय-
मानें तुमचा न्याय ठरणार आहे, असें समजून बोला व
वागणूक करा. १३ कारण ज्यानें दया केली नाहीं त्याचा न्याय
दयेवांचून होईल; दया न्यायावर प्रतिष्ठा मिरविते.

## श्रद्धा व कार्यें यांवर सूचना

१४ माझ्या बंधूंनो, मला विश्वास आहे, असें कोणी
म्हणत असून तो क्रिया करीत नाहीं तर त्यापासून काय
लाभ? तो विश्वास त्याला तारावयास शक्तिमान् आहे काय?
१५ भाऊ किंवा बहीण हीं उघडीं आहेत, त्यांस रोजच्या
अन्नाची वाण आहे, १६ आणि तुम्हांमधील कोणी त्यांस
म्हणतो, सुखानें जा, ऊब घ्या व तृप्त व्हा; पण त्यांच्या
शरीराला पाहिजे तें त्यांस तुम्ही देत नाहीं तर त्यापासून
काय लाभ? १७ याप्रमाणें विश्वासाबरोबर जर क्रिया
नाहींत तर तो जात्या निर्जीव आहे. १८ कोणी म्हणेल,
तुला विश्वास आहे, आणि मला क्रिया आहेत; क्रियांवांचून
तूं आपला विश्वास मला दाखीव, आणि मी आपला
विश्वास माझ्या क्रियांनीं तुला दाखवीन. १९ एक देव
आहे, असा विश्वास तूं धरितोस हें बरें करितोस; भूतेंहि
विश्वास धरितात व कांपतात. २० अरे असमंजस मनाच्या
मनुष्या, क्रियांवांचून विश्वास निरर्थक आहे हें समजावयास
तुला हवें काय? २१ आपला बाप 'अब्राहाम यानें आपला
पुत्र इसहाक याला यज्ञवेदीवर अर्पिलें' यांत तो क्रियांनीं
नीतिमान् ठरला नाहीं काय? २२ विश्वास त्याच्या क्रियां-
सहित कार्य करीत होता, आणि क्रियांनीं विश्वास पूर्ण झाला,
हें तुला दिसतें. २३ 'अब्राहामानें देवावर विश्वास ठेविला,
आणि हें त्याला नीतिमत्त्व असें मोजण्यांत आलें;' आणि
त्याला 'देवाचा मित्र' म्हणण्यांत आलें, हा शास्त्रलेख पूर्ण
झाला. २४ तर मग केवळ विश्वासद्वारा नव्हे, तर क्रियांनीं
मनुष्य नीतिमान् ठरतो, हें तुम्ही पाहतां. २५ तसेंच
राहाब वेश्या इनें देखील जासुदांचा पाहुणचार केला व
त्यांस दुसऱ्या वाटेनें लावून दिलें, यांत ती क्रियांनीं नीति-
मान् ठरली नाहीं काय? जसें शरीर आत्म्यावांचून निर्जीव
आहे तसा विश्वासहि क्रियांवांचून निर्जीव आहे.

## जीभ ताब्यांत ठेवणें

१ माझ्या बंधूंनो, तुम्ही बहुत शिक्षक होऊं नका,
**३** कारण तुम्हांस माहीत आहे कीं आपणांस अधिक दंड
होईल. २ आपण सर्वच पुष्कळ गोष्टींविषयीं चुकतों.
जर कोणी बोलण्यांत चुकत नाहीं तर तो पूर्ण मनुष्य, तो
सर्व शरीरहि कह्यांत ठेवण्यास शक्तिमान् आहे. ३
घोड्यांनीं आपल्या ताब्यांत राहावें म्हणून आपण त्यांच्या
तोंडांत लगाम घालतों, तेव्हां त्यांचें सर्व शरीर आपल्याला
फिरवितां येतें. ४ तारवेंहि पाहा, तीं एवढीं मोठीं आहेत,

व प्रचंड वाऱ्यानें लोटत जात असतात, तरी सुकाणदाराची इच्छा असते तिकडे तीं अवघीं लहानशा सुकाणानें फिरतात. ५ तशीच जीभहि लहानसें अंग असून मोठ्या गोष्टींची फुशारकी मारिते. पाहा, किती थोडका विस्तव केवढ्या मोठ्या रानाला पेटवितो! ६ जीभ ही आग आहे; ती अनीतीचें भुवन आहे; आपल्या अवयवांत सर्व शरीर मलीन करणारा अवयव जीभ आहे; ती भवचक्राला आग लावणारी आणि नरकानें पेटविलेली अशी आहे. ७ श्वापदें, पक्षी, सरपटणारे प्राणी, व समुद्रांतील जीव या प्रत्येकाचा स्वभाव मनुष्यस्वभावाला वश झाला आहे, आणि होत आहे; ८ परंतु मनुष्यांपैकीं कोणीहि जिभेला वश करावयास समर्थ नाहीं; ती शांतिरहित असून दुष्ट आहे व प्राणघातक विषानें भरलेली आहे. ९ तिच्या योगें प्रभु पिता याची आपण स्तुति करितों; आणि 'देवाच्या प्रतिमेप्रमाणें' केलेल्या मनुष्यांस तिच्याच योगें शापहि देतों; १० एकाच तोंडांतून स्तुति व शाप निघतात. माझ्या बंधूंनो, अशी गोष्ट व्हावी हें उचित नाहीं. ११ झऱ्याच्या एकाच छिद्रांतून गोड पाणी व कडू पाणी निघतें काय? १२ माझ्या बंधूंनो, अंजिराला जैतुनाचीं फळें आणि द्राक्षवेलाला अंजीर येतील काय? तसेंच खाऱ्या पाण्यांतून गोड पाणी निघणार नाहीं.

## खोटें व खरें ज्ञान

१३ तुम्हांमध्यें ज्ञानी व समंजस कोण आहे! त्यानें ज्ञानजन्य लीनतेनें सदाचरणाच्या योगें आपलीं कृत्यें दाखवावीं; १४ पण तुमच्या मनांत तीव्र मत्सर व तट पाडण्याचा स्वभाव आहे तर सत्याविरुद्ध ताठा मिरवूं नका, व लबाडी करूं नका. १५ हें ज्ञान वरून उतरत नाहीं; तर तें ऐहिक, इंद्रियजन्य, पैशाचिक असें आहे. १६ कारण जेथें मत्सर व तट पाडण्याचा स्वभाव आहे तेथें अव्यवस्था व प्रत्येक कुकर्म आहे. १७ वरून येणारें ज्ञान हें मुळांत शुद्ध असतें; शिवाय तें शांतिप्रिय, सौम्य, समजूत होण्याजोगें, दया व सत्फळें यांनीं पूर्ण, अपक्षपाती, निर्दंभ असें आहे. १८ आणि शांतता करणाऱ्यांसाठीं धार्मिकतारूपी फळ देणारें बीं शांतीनें पेरिलें जातें.

## पक्ष-कलहाबाबत सूचना

४ १ तुम्हांमध्यें लढाया व भांडणें कोठून उत्पन्न होतात? तुमच्या अवयवांत ज्या वासना लढाई करितात त्यांपासून कीं नाहीं? २ तुम्ही लोभ धरितां तरी तुम्हांस प्राप्त होत नाहीं; तुम्ही घात व हेवा करितां तरी इष्ट तें मिळविण्यास तुम्ही समर्थ नाहीं; तुम्ही भांडतां व लढतां; तुम्ही मागत नाहीं, यामुळें तुम्हांला प्राप्त होत नाहीं. ३ तुम्ही मागतां परंतु तुम्हांस मिळत नाहीं; कारण तुम्ही अयोग्य प्रकारें मागतां, म्हणजे आपल्या चैनीकरितां खर्चावें म्हणून मागतां. ४ अहो व्यभिचारिणींनो, जगाची मैत्री ही देवाबरोबर वैर आहे, हें तुम्हांस ठाऊक नाहीं काय? जो कोणी जगाचा मित्र होण्यास पाहतो तो देवाचा वैरी ठरला आहे. ५ जो आत्मा त्यानें आपल्या ठायीं ठेविला तो परप्रेमाची ईर्ष्या धरितो, हें शास्त्राचें म्हणणें व्यर्थ असें तुम्हांस वाटतें काय? ६ तो अधिक 'कृपादान देतो.' यास्तव शास्त्र म्हणतें, 'देव गर्विष्ठांचा विरोध करितो, आणि लीनांस कृपादान देतो.' ७ यास्तव देवाच्या अधीन व्हा; सैतानाविरुद्ध आडवे व्हा म्हणजे तो तुम्हांपासून पळेल. ८ देवाजवळ या म्हणजे तो तुम्हांजवळ येईल. पापी जनहो, हात शुद्ध करा; अहो द्विबुद्धीच्या लोकांनो, आपलीं अंतःकरणें पवित्र करा. ९ कष्टी व्हा, शोक करा, रडा; तुमच्या हसण्याचा शोक व तुमच्या आनंदाचा विषाद होवो. १० प्रभूसमोर नम्र व्हा म्हणजे तो तुम्हांस उंच करील.

११ बंधूंनो, एकमेकांविरुद्ध बोलूं नका. जो बंधूविरुद्ध बोलतो व आपल्या बंधूला दोष लावितो तो नियमाविरुद्ध बोलतो व नियमाला दोष लावितो; जर तूं नियमाला दोष लावितोस तर तूं नियम पाळणारा नव्हेस, न्यायाधीश आहेस. १२ नियमकर्ता व न्यायाधीश असा एकच आहे, तो तारावयास व नाश करावयास समर्थ आहे; आपल्या शेजाऱ्यास दोष लावणारा तूं कोण?

## बढाई मारूं नये म्हणून इशारा

१३ अहा! जे तुम्ही म्हणतां कीं आपण आजउद्यां अमुक शहरीं जाऊं, तेथें एक वर्ष घालवूं आणि व्यापार करून पैसा मिळवूं, १४ त्या तुम्हांला उद्यांचें समजत नाहीं. तुमचें आयुष्य काय आहे? तुम्ही वाफ आहां, ती थोडा

वेळ दिसते, आणि मग नाहींशी होते. १५ असें न म्हणतां प्रभूची इच्छा असेल तर आपण जगूं व अमुक अमुक करूं, असें म्हणा. १६ आतां तुम्ही आपल्याला फुशारकी मारतां येते म्हणून अभिमान बाळगतां; पण अशा प्रकारची सर्व फुशारकी वाईट आहे. १७ चांगलें करणें कळत असून जो त्याप्रमाणें वागत नाहीं त्याला तें पाप आहे.

### श्रीमंतांनीं केलेल्या जुलुमाचें प्रतिफळ

५ १ अहो धनवानांनो, जे कष्ट तुम्हांला होणार त्यांविषयीं आक्रोश करीत रडा. २ तुमचें धन नासलें आहे, व तुमच्या वस्त्रांला कसर लागली आहे. ३ तुमचें सोनें व तुमचें रुपें यांस जंग चढला आहे; त्यांचा तो जंग तुम्हांविरुद्ध साक्ष होईल, आणि तो 'अग्नी' सारखा तुमचा देह खाईल. 'तुमचें धन सांठविणें,' शेवटल्या दिवसांत झालें. ४ पाहा, ज्या कामकऱ्यांनीं तुमचीं शेतें कापिलीं आहेत त्यांची तुम्हीं अडकवून ठेविलेली 'मजुरी ओरडत आहे;' आणि कापणाऱ्यांच्या आरोळ्या 'सेनाधीश प्रभूच्या कानीं' गेल्या आहेत. ५ तुम्हीं पृथ्वीवर चैनबाजी व विलास केला आहे; 'वधाच्या दिवशीं' तुम्हीं आपल्या मनाची तृप्ति केली आहे. ६ धार्मिकास तुम्हीं दोषी ठरविलें, त्याचा घात केला; तो तुम्हांस 'अडवीत' नाहीं.

### सोशिकपणा बाळगावा म्हणून बोध

७ अहो बंधूंनो, प्रभूच्या आगमनापर्यंत धीर धरा. पाहा, शेतकरी भूमीच्या मोलवान् पिकाची वाट पाहत असतां, त्यास 'पहिला व शेवटला पाऊस' मिळेपर्यंत त्याविषयीं, तो धीर धरितो. ८ तुम्हीहि धीर धरा, आपलीं अंतःकरणें स्थिर करा, कारण प्रभूचें आगमन जवळ आलें आहे. ९ बंधूंनो, तुम्हीं दोषी ठरूं नये म्हणून एकमेकांवर चिडून कुरकूर करूं नका; पाहा; न्यायाधीश दारानजीक उभा आहे. १० बंधूंनो, जे संदेष्टे प्रभूच्या नामानें बोलले त्यांचें दुःखसहन व त्यांचा धीर यांविषयीं कित्ता घ्या. ११ पाहा, 'ज्यांनीं सहन केलें त्यांस आपण धन्य म्हणतों;' तुम्हीं ईयोबाच्या धीराविषयीं ऐकलें आहे, आणि प्रभूकडून जो त्याचा शेवट झाला तो पाहिला आहे; यावरून 'प्रभु फार कनवाळू व दयाळू' आहे हें तुम्हीं पाहिलें.

१२ माझ्या बंधूंनो, मुख्यतः शपथ वाहूं नका; स्वर्गाची, पृथ्वीची किंवा कोणतीहि दुसरी शपथ वाहूं नका; तुम्हीं दोषी ठरूं नये म्हणून तुम्हांस होय म्हणावयाचें तर होय म्हणा; नाहीं म्हणावयाचें तर नाहीं म्हणा.

### प्रार्थनेचें सामर्थ्य

१३ तुम्हांपैकीं कोणी दुःख भोगीत आहे काय? त्यानें प्रार्थना करावी. कोणी आनंदित आहे काय? त्यानें स्तोत्रें गावीं. १४ तुम्हांपैकीं कोणी दुखणाईत आहे काय? त्यानें मंडळीच्या वडिलांना बोलवावें, आणि त्यांनीं प्रभूच्या नामानें त्याला तेल लावावें व त्याजवर ओणवून प्रार्थना करावी; १५ विश्वासाची प्रार्थना दुखणाइतास वांचवील, प्रभु त्याला उठवील, आणि त्यानें पापें केलीं असलीं तरी त्याला क्षमा होईल. १६ यास्तव तुम्हीं निरोगी व्हावें म्हणून आपलीं पातकें एकमेकांजवळ कबूल करून एकमेकांसाठीं प्रार्थना करा. धार्मिकाची प्रार्थना कार्य करण्यांत फार प्रबळ असते. १७ एलीया आपल्यासारख्या स्वभावाचा मनुष्य होता; त्यानें पाऊस पडूं नये अशी आग्रहानें प्रार्थना केली, आणि साडेतीन वर्षेपर्यंत पृथ्वीवर पाऊस पडला नाहीं. १८ पुनः त्यानें प्रार्थना केली; तेव्हां आकाशानें पाऊस पाडिला, आणि भूमीनें आपलें फळ उपजविलें.

१९ माझ्या बंधूंनो, तुम्हांमधील कोणीं सत्यापासून बहकला आणि त्याला कोणीं माघारें फिरविलें, २० तर पापी मनुष्याला त्याच्या भ्रांतिमय मार्गापासून फिरविणारा तो त्याचा जीव मरणापासून तारील, व पापांची रास झाकील, असें त्यानें समजावें.

१ मुळांत: प्रेस्बुतर

# पेत्राचें पहिलें पत्र



### नमस्कार

१ पंत, गलतिया, कप्पदुकिया, आसिया व
1 बिथुनिया यांत पांगलेल्या (यहूदी) लोकांमध्यें
राहणारे, २ देवपित्याच्या पूर्वज्ञानानुसार, आत्म्याच्या
द्वारें झालेल्या पवित्रतेंत आज्ञांकित राहण्यासाठीं व
त्यांजवर येशू ख्रिस्ताच्या रक्तानें सिंचन होण्यासाठीं
निवडलेले प्रवासी, यांस येशू ख्रिस्ताचा प्रेषित पेत्र
याजकडून; तुम्हांला कृपा व शांति विपुल मिळोत.

### ख्रिस्तशिष्याला तारणप्राप्तीची आशा आहे म्हणून ईश्वरोपकारस्मरण

३,४,५ आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताचा पिता देव
धन्यवादित असो. सदाजीवी आशा प्राप्त होण्यासाठीं
आणि अविनाशी, निर्मळ व न कोमेजणारें वतन मिळ-
ण्यासाठीं, त्यानें आपल्या महादयेनुसार आपल्याला
मेलेल्यांतून येशू ख्रिस्ताच्या उठण्याच्या द्वारें पुनः
जन्म दिला; जें तारण शेवटल्या काळीं प्रकट होण्यास सिद्ध
आहे, तें प्राप्त व्हावें म्हणून तुम्ही देवाच्या शक्तीनें
विश्वासाच्या योगें राखिलेले आहां; त्या तुम्हांसाठीं तें
वतन स्वर्गांत राखून ठेविलें आहे. ६ तुम्ही आतां थोडा
वेळपर्यंत, जरूर पडलें तसें पुष्कळ परीक्षांमुळें दुःख
सोशिलें, पण तुम्ही त्या तारणाविषयीं आतां उल्लास करितां.
७ तुम्हीं यासाठीं सोशिलें कीं नाश होणाऱ्या सोन्याची
परीक्षा अग्नीनें करितात, त्या सोन्यापेक्षां मूल्यवान् असें जें
तुमच्या विश्वासाचें परीक्षेंत उतरणें त्यापासून प्रशंसा,
गौरव व मान, हीं फळें येशू ख्रिस्ताच्या प्रकट होण्याच्या
वेळेस मिळावीं; ८, ९ त्याला पाहिलें नसतां त्याजवर
तुम्ही प्रीति करतां; आतां तो दिसत नसतां त्याजवर
विश्वास ठेवतां; आणि त्या विश्वासाचा शेवट म्हणजे
आपल्या जिवांचें तारण उपभोगीत अनिर्वाच्य गौरवयुक्त
आनंदानें उल्लासतां. १० ज्या संदेष्ट्यांनीं तुम्हांवर होणाऱ्या
कृपेविषयीं भविष्य कथन केलें, त्यांनीं त्या तारणाविषयीं
बारकाईनें शोध केला; ११ त्यांच्यामध्यें जो ख्रिस्ताचा
आत्मा होता त्यानें ख्रिस्ताचीं दुःखें व त्यानंतरच्या गौरवयुक्त
गोष्टी हीं पूर्वींच सांगितलीं; त्यांत त्यानें कोणता अगर कसा
काळ सुचविला याविषयीं ते शोध करीत होते. १२ त्यांस
असें प्रकट करण्यांत आलें होतें कीं स्वर्गांतून पाठविलेल्या
पवित्र आत्म्याच्या द्वारें तुम्हांस सुवार्ता सांगणाऱ्यांनीं ज्या
गोष्टी तुम्हांस आतां सांगितल्या आहेत त्याच गोष्टी
कळविण्याची सेवा ते करीत होते; ती सेवा स्वतःसाठीं
नव्हे, तर तुम्हांसाठीं करीत होते; त्या गोष्टी न्याहाळून
पाहण्याची उत्कंठा देवदूतांस आहे.

### ख्रिस्तशिष्यांस शोभेसें शील

१३ यास्तव तुम्ही आपल्या मनरूपी कंबरा बांधा आणि
सावध राहून येशू ख्रिस्ताचें प्रकटीकरण होण्याच्या वेळीं
तुम्हांस प्राप्त होणाऱ्या कृपेवर पूर्ण आशा ठेवा. १४
तुम्ही आज्ञांकित मुलें व्हा आणि अज्ञानावस्थेंतील
आपल्या पूर्वींच्या वासनांप्रमाणें वागूं नका; १५ तर
ज्यानें तुम्हांस पाचारण केलें तो जसा पवित्र आहे तसे
तुम्हीहि सर्व प्रकारच्या आचरणांत पवित्र व्हा; १६ कारण,
'मी पवित्र आहें यास्तव तुम्ही पवित्र व्हा,' असा शास्त्र-
लेख आहे. १७ जो तोंड न पाहतां प्रत्येकाच्या कर्मा-
प्रमाणें त्याचा न्याय करितो त्याला जर तुम्ही, 'पिता,'
म्हणून हाक मारितां तर आपल्या प्रवासाच्या काळांत
भिऊन वागा. १८ वाडवडील माणसांच्या परंपरेनें चालत
आलेल्या आपल्या व्यर्थ वागणुकीपासून सोनें, रुपें अशा
नाशवंत वस्तूंनीं नव्हे, १९ तर निष्कलंक व निर्दोष
कोकरा, असा जो ख्रिस्त, त्याच्या मूल्यवान् रक्तानें तुम्ही
मुक्त झालां आहां हें ध्यानांत ठेवा. २० जगाच्या स्थापने-
पूर्वी त्याचें पूर्वज्ञान झालें होतें; तोच काळाच्या शेवटीं
तुम्हांसाठीं प्रकट झाला; २१ तुम्ही त्याच्या द्वारें देवावर

विश्वास ठेवणारे झालां आहां; त्या देवानेंच त्याला मृता-
वस्थेंतून उठवून त्याचें गौरव केलें, यामुळें तुमचा विश्वास
व आशा देवावर आहे. २२ निष्कपट बंधुप्रीति उत्पन्न
होईल असे आपले जीव सत्यपालनानें शुद्ध करून एकमे-
कांवर मनापासून निष्ठेनें प्रीति करा; २३ कारण तुम्ही
नाशवंत बीजापासून नव्हे, तर अविनाशी बीजापासून
म्हणजे 'देवाच्या सदाजीवी व टिकणाऱ्या' वचनाच्या
द्वारें पुनः जन्मविलेले आहां.

२४ कारण,

सर्व मानवजाति गवतासारखी आहे;
आणि तिचें सर्व गौरव गवताच्या
फुलासारिखें आहे.
गवत सुकतें व त्याचें फूल गळतें;
२५ परंतु प्रभूचें वचन सर्वकाळ टिकतें.

ज्या वचनाची 'सुवार्ता' तुम्हांस 'सांगितली' तें
हेंच आहे.

२ १ यास्तव सर्व दुष्टभाव, सर्व कपट, ढोंग, हेवा
व सर्व दुर्भाषणें सोडून, २, ३ 'प्रभु कृपाळू आहे
याचा तुम्हीं अनुभव घेतला आहे,' तर नूतन जन्म-
लेल्या बालकांसारखे तारणासाठीं वृद्धि होण्यास आध्यात्मिक
निऱ्या दुधाची इच्छा धरा; ४ मनुष्यांनीं नाकारिलेला तरी
देवाच्या दृष्टीनें 'निवडलेला व मूल्यवान्' असा जो
जिवंत धोंडा त्याजवळ आल्यानें, ५ तुम्हीहि आध्या-
त्मिक मंदिर, जिवंत धोंडे, देवाला आवडणारे असे
आध्यात्मिक स्वरूपाचे यज्ञ येशू ख्रिस्ताच्या द्वारें अर्पिण्या-
साठीं पवित्र याजकगण असे रचिले जात आहां.

६ कारण शास्त्रांत असा लेख आहे:

पाहा, निवडलेली, मूल्यवान् अशी कोनशिला मी
सीयोनांत बसवितों;
तिच्यावर विश्वास ठेवणारा फजीत होणार नाहीं.
७ यास्तव तुम्हां विश्वास ठेवणाऱ्यांस सन्मान मिळणार;
जे विश्वासाविषयीं अमान्य आहेत त्यांस,
बांधणाऱ्यांनीं नापसंत केलेला दगड
तोच कोनशिला झाला;
८ आणि ठेच लागण्याचा धोंडा
व अडखळण्याचा खडक असा झाला;

ते वचनाला अमान्य असल्यानें ठेच खातात,
त्यासाठीं ते नेमलेहि होते. ९ तुम्ही तर 'निवडलेला वंश,
राजकीय याजकगण, पवित्र राष्ट्र,' देवाचे 'स्वतःचे लोक'
असे आहां; 'यासाठीं कीं' ज्यानें तुम्हांस अंधकारांतून
काढून आपल्या अद्भुत प्रकाशांत पाचारण केलें त्याचे
'गुण तुम्हीं प्रसिद्ध करावे;' १० ते तुम्ही पूर्वी 'लोक
नव्हता,' आतां तर 'देवाचे लोक आहां; तुम्हांस दयेची
प्राप्ति झाली नव्हती,' आतां तर 'दया मिळाली आहे.'

११ प्रिय बंधूंनो, जे तुम्ही परदेशी व प्रवासी आहां
त्या तुम्हांस मी विनंति करितों कीं जिवाबरोबर लढणाऱ्या
दैहिक वासनांपासून दूर राहा; १२ विदेशी लोकांत आपलें
आचरण चांगलें ठेवा, यासाठीं कीं ज्याविषयीं ते तुम्हांस
दुष्कर्मी समजून तुम्हांविरुद्ध दुर्भाषण करितात त्याविषयीं
त्यांनीं तुमचीं सत्कर्मे पाहून 'समाचाराच्या दिवशीं'
देवाचें गौरव करावें.

## सरकारी अधिकाऱ्यांना अंकित होऊन राहणें

१३ मनुष्यांनीं स्थापिलेल्या प्रत्येक व्यवस्थेला प्रभूकरितां
अधीन असा; राजा श्रेष्ठ, म्हणून त्याच्या; १४ आणि
अधिकारी वाईट करणाऱ्यांना शिक्षा देण्यासाठीं व चांगलें
करणाऱ्याची स्तुति करण्यासाठीं त्याचे पाठविलेले, म्हणून
त्यांच्या अधीन असा. १५ देवाची इच्छा अशी आहे कीं
तुम्हीं चांगलें करण्यानें निर्बुद्ध मनुष्यांच्या
अज्ञानाला कुंठित करावें; १६ आपली स्वतंत्रता ही दुष्ट-
पणाचें झाकण न करितां तुम्ही स्वतंत्र, तरी देवाचे दास,
असे असा. १७ सर्वांस मान द्या. बंधुवर्गावर प्रीति करा.
'देवाचें भय धरा. राजाला मान द्या.'

## सेवेचा अर्थ

१८ घरच्या चाकरांनो, तुम्ही आपल्या धन्याच्या
अधीन असा; जे चांगले व सौम्य त्यांच्याच केवळ नव्हे,
तर जे कठोर त्यांच्याहि पूर्ण भयानें अधीन असा. १९
कोणी ईश्वरचिंतन करून अन्यायानें आलेलीं दुःखें सोसिलीं
तर हा चांगुलपणा आहे. २० पाप केल्याबद्दल मिळालेल्या
ठुकांना तुम्ही शांतीनें सोसिलें यांत काय मोठी कीर्ति?
चांगलें करीत असूनहि दुःख भोगणें व तें शांतीनें सोसणें

हें देवाला योग्य असें वाटेल. २१ याचकरितां तुम्हांस
पाचारण करण्यांत आलें आहे; कारण ख्रिस्तानेंहि तुम्हां-
साठीं दुःख सोशिलें; तुम्हीं त्याच्या पावलांस अनुसरावें
म्हणून तुम्हांकरितां कित्ता घालून ठेविला आहे; २२ त्यानें
'पाप केलें नाहीं, आणि त्याच्या मुखांत कपट आढळलें
नाहीं;' २३ त्याची निंदा होत असतां त्यानें उलट निंदा
केली नाहीं; दुःख सोशीत असतां त्यानें धमकाविलें नाहीं;
तर यथार्थ न्याय करणाऱ्याकडे तें सर्व सोपवून दिलें. २४
'त्यानें स्वतः' तुमचीं आमचीं 'पापें' स्वदेहानें 'वाहून'
खांबावर 'नेलीं,' यासाठीं कीं आपण पापाचरणासंबंधानें
मृत होऊन धार्मिक आचरणासाठीं जीवंत राहावें; त्याला
बसलेल्या 'माराच्या वळांनीं तुम्ही निरोगी झालां.' २५
तुम्ही मेंढरांसारखे भटकत होतां; परंतु आतां तुमच्या
जिवांचा मेंढपाळ व अध्यक्ष[1] याजकडे माघारे फिरलां आहां.

## पति व पत्नी

१ स्त्रियांनो, तुम्ही तशाच आपापल्या नवऱ्याच्या
३ अधीन असा; यासाठीं कीं कोणी वचनाला अमान्य
असले, २ तरी तुमचें भिडस्तपणाचें पवित्र वर्तन
पाहून वचनावांचून आपल्या स्त्रियांच्या वर्तनानें ते मिळवून
घेण्यांत यावे. ३ तुमची शोभा केसांचें गुंफणें, सोन्याचे
दागिने घालणें, किंवा पोशाक करणें यांनीं बाहेरून आणलेली
नसावी; ४ तर जो सौम्य व शांत आत्मा देवाच्या दृष्टीनें
बहुमूल्य आहे त्यानें, म्हणजे अंतःकरणांतील गुप्त मनुष्य-
पणानें, जी अविनाशी शोभा ती असावी. ५ याप्रमाणें
पूर्वीं, देवावर आशा ठेवणाऱ्या पवित्र स्त्रियांनींहि आपा-
पल्या नवऱ्याच्या अधीन राहून आपणांस शोभविलें; ६
तशी सारा अब्राहामाला 'धनी' म्हणून त्याच्या आज्ञेंत
राहिली; तुम्ही चांगलें करीत राहिल्यास व कोणत्याहि भय-
प्रद गोष्टीची भीति न बाळगल्यास, तिचीं आतां मुलें झालां
आहां.

७ नवऱ्यांनो, तसे तुम्ही आपल्या स्त्रियांबरोबर, त्या
अधिक नाजूक पात्र आहेत म्हणून, सुज्ञतेनें सहवास ठेवा;
जीवनरूपी कृपादानाचे त्यांचे वतनबंधु असे तुम्ही त्यांना
मान द्या; म्हणजे तुमच्या प्रार्थनांला व्यत्यय येणार नाहीं.

१ मुळांत : एपिस्कोप

## ख्रिस्तनिष्ठ मनुष्यास शोभणारी सहानुभूति

८ सारांश, तुम्ही सर्व एकचित्त, समसुखदुःखी, बंधु-
प्रीति करणारे, कनवाळू, नम्र मनाचे असे व्हा; ९ वाइटा-
बद्दल वाईट, निंदेबद्दल निंदा असें करूं नका; तर उलट
आशीर्वाद द्या; आशीर्वाद हें वतन मिळण्यासाठीं तुम्हांला
पाचारण करण्यांत आलें आहे.
१० कारण
जीवित आवडतें व्हावें,
व चांगले दिवस पाहावे,
अशी ज्याची इच्छा आहे,
त्यानें दुर्भाषणापासून आपली जिव्हा
व कपटी भाषणापासून आपले ओठ आवरावे;
११ त्यानें वाइटाचा त्याग करून बरें तें करावें;
त्यानें शांतिप्राप्त्यर्थ प्रयत्न करून
तिचें अवलंबन करावें.
१२ कारण परमेश्वराचे नेत्र धार्मिकांवर असतात,
व त्याचे कान त्यांच्या विनंतीकडे असतात;
तरी वाईट करणाऱ्यांवर परमेश्वराची नजर आहे.

## अन्याय सोशीत राहणें व ख्रिस्ताचें उदाहरण

१३ जर तुम्ही चांगल्याची आस्था धरणारे आहां तर
तुमचें वाईट करणारा कोण? १४ आणि जरी तुम्हांला
धार्मिकतेमुळें दुःख सोसावें लागलें, तरी तुम्ही धन्य;
'त्यांच्या भयानें भिऊं नका व घाबरूं नका;' १५ तर ख्रिस्त
'प्रभु' याला आपल्या अंतःकरणांत 'पवित्र माना;' आणि
तुम्हांमध्यें जी आशा आहे तिची विचारपूस करणाऱ्या
प्रत्येक इसमाला उत्तर देण्यास नेहमीं सिद्ध असा; तरी तें
सौम्यतेनें व भिडेनें द्या; १६ तें सद्भाव धरून द्या;
यासाठीं कीं ज्याविषयीं तुमची निंदा होते, त्याविषयीं
ख्रिस्तामधील तुमच्या सद्वर्तनावर आळ घेणाऱ्यांनीं
लज्जित व्हावें. १७ चांगलें करूनहि दुःख सोसावें
अशी देवाची इच्छा असली, तर वाईट करून दुःख
सोसण्यापेक्षां तें बरें आहे. १८ कारण आपल्याला देवा-
जवळ नेण्यासाठीं ख्रिस्तानेंहि पापांबद्दल, म्हणजे धार्मिक
पुरुषानें अधार्मिक लोकांकरितां, एकदा दुःख सोशिलें; तो
देहरूपें जिवें मारिला गेला आणि आध्यात्मिकरीत्या

जीवंत केला गेला; १९ त्या आत्म्याच्या रूपानें त्यानें
जाऊन बंदिशाळेंतील आत्म्यांजवळ घोषणा केली. २०
पूर्वी नोहाच्या दिवसांत, तारवांत थोडके म्हणजे आठ
प्राणी पाण्यांतून वांचविण्यांत आले; तें तारू तयार होत
असतां देवाची सहनशीलता वाट पाहत होती, त्या
दिवसांत ज्या आत्म्यांनीं अवमान केला तेच हे होते; २१
त्या पाण्याचा नमुना जो बाप्तिस्मा, त्याच्यायोगें देहाचा
मळ दूर करणें नव्हे, तर चांगलें मन राखण्याचा
देवाबरोबर करार करणें होय; तो आतां येशू ख्रिस्ताच्या
पुनः उठण्याच्या द्वारें तुम्हांस तारीत आहे. २२ तो
स्वर्गांत जाऊन देवाच्या उजवीकडे आहे आणि त्याच्या
स्वाधीन देवदूत, अधिकारी व सत्ताधीश हे ठेविले
आहेत.

## पापाचा त्याग करणें

१ ख्रिस्तानें देहरूपें दुःख सोशिलें तसेंच तुम्हीहि
४ तेंच मनोवृत्तिरूपी शस्त्र धारण करा; कारण ज्यानें
देहानें सोशिलें आहे तो पापापासून निवृत्त झाला
आहे; २ ह्यासाठीं कीं तुम्हीं आपलें उरलेलें दैहिक आयुष्य
मनुष्यांच्या वासनांप्रमाणें नव्हे तर देवाच्या इच्छेप्रमाणें
घालवावें. ३ कारण विदेशी लोकांना आवडणारीं कर्में
करण्यांत, म्हणजे कामासक्ति, विषयवासना, मद्यासक्ति,
रंगेलपणा, बदफैली व अमंगळ मूर्तिपूजा यांत राहण्यांत
जो काळ गेला तितका पुरे; ४ तुम्ही त्यांच्या दंगलाच्या
भरांत त्यांजबरोबर धावत नाहीं ह्याचें त्यांस नवल वाटून
ते तुमची निंदा करितात; ५ जो जीवंतांचा व मृतांचा
न्यायनिवाडा करण्यास तयार आहे त्याला ते हिशेब देतील.
६ सुवार्ता मृतांनाहि सांगितली होती, यासाठीं कीं
मनुष्यांनुसार त्यांचा देहसंबंधानें न्यायनिवाडा व्हावा, पण
त्यांनीं आत्म्यानें देवानुसार जगावें.

७ आतां सर्वांचा शेवट जवळ आला आहे; यास्तव
मर्यादेनें राहा, व प्रार्थना करण्यासाठीं सावध असा; ८
मुख्यतः एकमेकांवर एकनिष्ठेनें प्रीति करा; कारण ‘प्रीति
पापांची रास झाकून टाकिते.’ ९ कुरकूर न करितां
एकमेकांचा पाहुणचार करणारे व्हा; १० प्रत्येकाला जसें
कृपादान मिळालें आहे तसें देवाच्या नानाविध कृपेच्या
चांगल्या कारभाऱ्यांसारिखे तें एकमेकांच्या कारणीं लावा;
११ भाषण करणाऱ्यानें आपण देवाचीं वचनें बोलत आहों
असें बोलावें; सेवा करणाऱ्यानें, ती आपण देवानें
पुरविलेल्या शक्तीनें करीत आहों, अशी करावी; यासाठीं
कीं सर्व गोष्टींत येशू ख्रिस्ताच्या द्वारें देवाचें गौरव व्हावें;
गौरव व पराक्रम हीं युगानुयुग त्याचीं आहेत. आमेन.

## ख्रिस्तासाठीं दुःखसहन करण्याचा हक्क

१२ प्रिय बंधूंनो, तुमच्या परीक्षणासाठीं जें तीव्र संकट
तुम्हांवर आलें आहे त्यावरून आपणांस कांहीं अपूर्व झालें
असें वाटून त्याचें नवल मानूं नका; १३ ज्यापेक्षां तुम्ही
ख्रिस्ताच्या दुःखांचे वांटेकरी झालां आहां त्यापेक्षां आनंद
करा; म्हणजे त्याचें गौरव प्रकट होण्याच्या वेळेसहि तुम्ही
उल्लासानें आनंद कराल. १४ ‘ख्रिस्ता’ च्या नांवामुळें
‘तुमची निंदा होत असल्यास’ तुम्ही धन्य आहां; कारण
गौरवाचा आत्मा म्हणजे ‘देवाचा आत्मा’ तुम्हांवर
येऊन ‘राहिला आहे.’ १५ तरी खून करणारा, चोर,
दुष्कर्मी, किंवा दुसऱ्यांच्या कामांत ढवळाढवळ
करणारा असें होऊन कोणीं दुःख सोसूं नये; १६ ख्रिस्ती
आहे म्हणून कोणी दुःख सहन करितो तर त्यानें लाजूं
नये; त्या नांवामुळें देवाचें गौरव करावें. १७ देवाच्या
‘घरापासून’ न्यायनिवाड्यास ‘आरंभ होण्याची वेळ’
आहे; आणि तो आरंभ प्रथम आपल्यापासून झाला, तर
देवाच्या सुवार्तेचा अवमान करण्याऱ्यांचा परिणाम काय
होईल? १८ ‘धार्मिक इसम जर कष्टानें तरतो तर
अनीतिमान् व पापी इसम यांला ठिकाण कोठें मिळेल?’
१९ यामुळेंच देवाच्या इच्छेप्रमाणें दुःख सहन करणाऱ्यांनी
सुकृति करीत आपले जीव विश्वासू उत्पन्नकर्त्याला सोपून
द्यावे.

## वडिलांना बोध

१ तुम्हांतील वडील मंडळीला, जो मी सोबतीचा
५ वडील[1], ख्रिस्ताच्या दुःखांचा साक्षी व प्रकट होणाऱ्या
गौरवाचा विभागी तो मी बोध करितों; २ तुम्हां-
मधील देवाच्या कळपाचें पालन करा; आणि [illegible] म्हणून
नव्हे, तर देवाच्या इच्छेप्रमाणें संतोषानें त्याची देखरेख

[1] मुळांत : प्रेस्बुतर

करा; द्रव्यलोभानेंहि नव्हे तर उत्सुकतेनें करा; ३ तुमच्या
दिम्मतीच्या लोकांवर धनीपण करणारे असें नव्हे, तर
कळपाला कित्ते व्हाल असें करा; ४ मग मुख्य मेंढपाळ
प्रकट होईल तेव्हां तुम्हांस गौरवाचा न कोमेजणारा हार
प्राप्त होईल. ५ तसेंच तरुणांनो, वडिलांच्या अधीन
राहा, आणि ऐकमेकांची सेवा करण्यासाठीं तुम्ही सर्व जण
नम्रतारूपी कमरबंद बांधा; कारण 'देव गर्विष्ठांचा विरोध
करितो, आणि लीनांवर कृपा करितो.'

### सर्वसामान्य बोध

६ यास्तव देवाच्या पराक्रमी हाताखालीं लीन व्हा,
यासाठीं कीं त्यानें योग्य वेळीं तुम्हांस उंच करावें. ७
त्याजवर तुम्ही 'आपली' सर्व 'चिंता टाका' कारण तो
तुमची काळजी घेतो. ८ सावध असा, जागे राहा; तुमचा
शत्रु सैतान हा गर्जणाऱ्या सिंहासारखा कोणाला गिळावें हें
शोधीत फिरतो; ९ त्याच्याविरुद्ध विश्वासांत दृढ असें उभे
राहा; जगांतील तुमच्या बंधुवर्गाला हींच दुःखें नेमल्याप्रमाणें
होत आहेत हें लक्षांत असूं द्या. १० तुम्ही थोडा वेळ
दुःख सोसल्यावर, आपल्या सार्वकालिक गौरवांत यावें
म्हणून ज्यानें ख्रिस्तामध्यें तुम्हांस पाचारण केलें तो सर्व
कृपेचा देव स्वतः तुम्हांस पूर्ण, दृढ व सबळ करील; ११
त्याला युगानुयुग पराक्रम असो. आमेन.
१२ माझ्या मतें विश्वासू असा आपला बंधु सिल्वान
याच्या हातीं मीं थोडक्यांत हें लिहून पाठवून त्यांत बोध
केला आहे व साक्ष दिली आहे कीं ही देवाची खरी कृपा
आहे, हिच्यांत तुम्ही दृढ राहा. १३ बाबेलांतील तुम्हां-
सारखी निवडलेली ( मंडळी ) तुम्हांस सलाम सांगते; आणि
माझा पुत्र मार्क हाहि सांगतो. १४ प्रीतीच्या चुंबनानें
एकमेकांस सलाम करा.

ख्रिस्तामधील तुम्हां सर्वांस शांति असो.

# पेत्राचें दुसरें पत्र



### नमस्कार

१ आपला देव व तारणारा येशू ख्रिस्त यांच्या
१ न्याय्यत्वानें आमच्यासारखा मोलवान् विश्वास मिळा-
लेल्या लोकांस, येशू ख्रिस्ताचा दास व प्रेषित शिमोन
पेत्र याजकडून; २ देव आपला प्रभु येशू यांच्या ओळखीनें
तुम्हांला कृपा व शांति विपुल मिळो.

### ख्रिस्ती मनुष्याचे हक्क व शील

३ ज्यानें तुम्हांआम्हांला आपल्या गौरवानें व सत्त्वानें
पाचारण केलें त्याच्या ओळखीच्या द्वारें, त्याच्या दैवी
सामर्थ्यानें, जीवनास व सुभक्तीस जें सर्व कांहीं साधक तें
आपल्याला दिलें आहे, हें तुम्हांला माहीत आहे; ४
त्यांच्या योगें मोलवान् व अति महान् अशीं वचनें आप-
ल्याला देण्यांत आलीं आहेत, यासाठीं कीं त्यांच्या द्वारें
तुम्हीं वासनेपासून उत्पन्न होणारी जगांतील भ्रष्टता चुकवून
ईश्वरी स्वभावाचे विभागी व्हावें. ५ याच कारणानें तुम्ही
होईल तितका प्रयत्न चालवून आपल्या विश्वासांत सात्त्वि-
कतेची, सात्त्विकतेंत ज्ञानाची, ६ ज्ञानांत इंद्रियदमनाची,
इंद्रियदमनांत धीराची, धीरांत सुभक्तीची, ७ सुभक्तींत
बंधुप्रीतीची व बंधुप्रीतींत प्रीतीची भर घाला; ८ कारण
हे गुण तुम्हांमध्यें असून वाढते असले तर, आपला प्रभु
येशू ख्रिस्त याच्या ज्ञानाविषयीं तुम्हीं निरुद्योगी व निष्फळ
होऊं नये, असें ते तुम्हांस करितील. ९ ज्याच्या अंगीं
ते नाहींत तो अंधळा आहे, अदूरदर्शी आहे, त्याला
आपल्या पूर्वींच्या पापांपासून शुद्ध झाल्याचा विसर पडला
आहे. १० यास्तव बंधूंनो, तुम्हांस झालेलें पाचारण व
तुमची निवडणूक ह्यासंबंधानें खातरी करून घेण्याबद्दल
विशेषतः प्रयत्न करा, असें तुम्हीं केल्यास तुमचें पतन
कधींच होणार नाहीं; ११ आणि तशा प्रकारें आपला प्रभु

तारणारा येशू ख्रिस्त यांच्या सार्वकालिक राज्यांत प्रशस्त-
पणें तुमचा प्रवेश होईल.

## जागृत राहण्याबाबत इशारा

१२ या कारणास्तव जरी तुम्हांला या गोष्टी कळतात
आणि तुम्हांस प्राप्त झालेल्या सत्यांत तुम्ही स्थिर झालेले
आहां तरी तुम्हांला त्यांची नेहमीं आठवण देण्याची
मी काळजी ठेवीन. १३ मी या मंडपांत आहें तोंपर्यंत
तुम्हांस आठवण देऊन जागृत करणें हें मला उचित वाटतें;
१४ कारण मला ठाऊक आहे कीं आपल्या प्रभु येशू
ख्रिस्तानें मला कळविल्याप्रमाणें मला आपला मंडप एका-
एकीं काढावा लागणार आहे; १५ आणि माझें निर्याण
झाल्यावरहि त्या गोष्टींची आठवण सर्वदा तुम्हांस करितां
यावी म्हणून मी होईल तितकें करीन. १६ कारण चातुर्यानें
कल्पिलेल्या कथांस अनुसरून आम्हीं आपल्या प्रभु येशू
ख्रिस्ताचा पराक्रम व आगमन ह्यांसंबंधानें तुम्हांस कळविलें
असें नाहीं; तर आम्ही त्याचें महत्त्व प्रत्यक्ष पाहणार होतों;
१७ त्याला देवपित्यापासून सन्मान व गौरव मिळालें; तेव्हां
ऐश्वर्यशाली गौरवाच्या द्वारें अशी वाणी झाली कीं हा
माझा पुत्र, मला परमप्रिय आहे, यांजविषयीं मी संतुष्ट
आहें. १८ आम्हीं पवित्र डोंगरावर त्याजबरोबर असतांना
आकाशांतून आलेली ही वाणी ऐकली. १९ शिवाय अधिक
निश्चित असें संदेष्ट्यांचें वचन आम्हांजवळ आहे; तें
अंधक ठिकाणीं प्रकाश पाडणाऱ्या दिव्याप्रमाणें आहे;
तुमच्या अंतःकरणांत दिवस उजाडेपर्यंत व प्रभाताचा तारा
उगवेपर्यंत तुम्ही त्याकडे लक्ष द्याल तर चांगलें होईल; २०
हें प्रथम मनांत आणावयाचें कीं शास्त्रांतील कोणत्याहि संदे-
शाचा स्वतःच्या कल्पनेनें उलगडा होत नाहीं; २१ कारण
संदेश मनुष्यांच्या इच्छेनें कधीं झालेला नाहीं; तर पवित्र
आत्म्यानें प्रेरित झालेल्या मनुष्यांनीं देवापासून तो सांगि-
तलेला आहे.

## खोटे संदेष्टे व पापी जीवनक्रम

१ तरी (इस्राएल) लोकांतहि खोटे संदेष्टे होते
२ तसे तुम्हांतहि खोटे शिक्षक उत्पन्न होतील; ते नाश-
कारक पाखंडी मतें गुप्तपणें प्रचारांत आणितील; ज्या
स्वामीनें त्यांस विकत घेतलें त्यालाहि ते नाकारतील;
आणि आपणांवर आकस्मिक नाश ओढवून घेतील. २
त्यांच्या कामातुरपणाच्या आचरणाचें अनुकरण पुष्कळ
लोक करितील; त्यांच्यामुळें सत्यमार्गाची निंदा होईल. ३
ते लोभासक्त होऊन कृत्रिम भाषणानें तुम्हांवर पैसे मिळ-
वितील; त्यांच्याकरितां नेमलेला दंड पहिल्यापासूनच
विलंब करीत नाहीं; आणि त्यांचा नाश डुलक्या खात नाहीं;
४ ज्या देवदूतांनीं पाप केलें त्यांस देवानें सोडिलें नाहीं;
तर त्यांस नरकांत टाकिलें आणि न्यायनिवाड्याकरितां
राखून अंधकारमय खळग्यांत ठेविलें; ५ त्यानें प्राचीन
जगालाहि सोडिलें नाहीं, तर अभक्तांच्या जगावर जलप्रलय
आणिला; आणि धार्मिकतेचा उपदेशक नोहा यांचें सात
जणांसह रक्षण केलें; ६ पुढें होणाऱ्या अभक्तांस उदाहरण
देण्यासाठीं सदोम व गमोरा हीं नगरें भस्म करून
त्यास विध्वंसाची शिक्षा केली; ७ आणि अधार्मिक
लोकांच्या कामातुर वर्तनानें त्रासलेला धार्मिक लोट
याची सुटका केली; ८ (तो धार्मिक मनुष्य त्यांच्यामध्यें
राहत होता; तेव्हां त्यांचीं अधार्मिक कृत्यें पाहून व
त्यांविषयीं ऐकून त्याचा धर्मशील जीव दिवसेंदिवस कासा-
वीस होत होता.) ९ भक्तिमान् लोकांस परीक्षेतून सोड-
विणें व अधार्मिक लोकांस शिक्षा भोगीत न्यायाच्या दिव-
सासाठीं राखून ठेवणें, हें प्रभूला कळतें. १० विशेषतः
अमंगळपणाच्या वासनेनें देहोपभोगाच्या पाठीस लागणारे
व अधिकार तुच्छ मानणारे यांस राखून ठेवणें हें प्रभूला
कळतें. ते उद्धट, स्वच्छंदी, श्रेष्ठांची निंदा करण्यास न
भिणारे, असे आहेत. ११ बलानें व पराक्रमानें अधिक
असे देवदूतहि प्रभूसमोर त्यांस निंदून दोषी ठरवीत नाहींत.
१२ ते निर्बुद्ध प्राणी स्वतःस कळत नाहींत अशांविषयीं
निंदा करीत असतात; पकडले जाऊन त्यांचा नाश व्हावा
एवढ्यासाठीं जन्मलेल्या पशूंसारखे ते आहेत; त्यांचा
स्वतःच्या भ्रष्टतेनें नाश होईल. १३ अधर्माचरणाचें वेतन
म्हणजे अपकार हा त्यांच्या पदरीं पडतो; एका दिवसाची
चैनबाजी हें ते सुख मानितात; ते डाग व कलंक आहेत;
तुम्हांबरोबर मेजवान्या खातांना कपटाच्या मौजा मारितात.
१४ त्यांचे डोळे वेश्यासक्तीनें भरलेले आणि पाप करण्या-

१ अथवा : भविष्यवादी

विषयीं ते हावरे आहेत; ते अस्थिर मनांच्या लोकांना
मोह घालितात; त्यांचें हृदय लोभाला सवकलेलें आहे; ते
शापाचीं मुलें आहेत; १५ ते सरळ मार्ग सोडून बहकले,
बौराचा पुत्र बलाम याच्या मार्गाला ते अनुसरले; त्याला
अधर्माचें वेतन प्रिय होतें. १६ त्याला त्याच्या उल्लंघनाबद्दल
वाग्दंड झाला; मुक्या गाढवानें मनुष्यवाणीनें बोलून संदे-
ष्ट्याचा वेडेपणा थांबविला. १७ ते जलशून्य झरे, वादळानें
उडविलेलें धुकें, असे आहेत; त्यांच्यासाठीं घनांधकाराची
काळोखी राखलेली आहे. १८ भ्रमांत असणाऱ्या लोकांतून
ते बाहेर पडले न पडले तोंच ते लोक त्यांस व्यर्थपणाच्या
फुगीर गोष्टी सांगतात व दैहिक वासनाधीन करून त्यांस
कामातुरपणाचे मोह घालितात. १९ ते त्यांस स्वतंत्रतेचें
वचन देतात आणि स्वतः तर भ्रष्टतेचे दास आहेत; कारण
ज्यानें एकाद्याला जिंकून घेतलेलें असतें त्याचा तो दासहि
बनलेला असतो. २० प्रभु व तारणारा येशू ख्रिस्त याच्या
ज्ञानद्वारें जगाच्या मळांतून सुटल्यावर ते पुनः जर त्यांत
गुंतून त्याच्या अधीन झाले तर त्यांची शेवटली दशा
पहिल्या दशेपेक्षां वाईट झाली आहे. २१ कारण धार्मिक-
तेचा मार्ग समजून आल्यानंतर आपणांस दिलेल्या पवित्र
आज्ञेपासून परावृत्त होणें यापेक्षां तो न समजणें हें त्यांस
बरें होतें. २२ 'आपल्या ओकीकडे परतलेलें कुत्रें' व
गाळांत लोळण्यास अंग धुतल्यानंतर परतलेली 'डुकरीण,'
अशी जी खरी म्हण आहे तिच्याप्रमाणें त्यांची गोष्ट
झाली आहे.

## ख्रिस्ताच्या पुनरागमनाचा दिवस

३ १ प्रिय बंधूंनो, आतां हें मी तुम्हांस दुसरें पत्र
लिहीत आहें; या दोहोंमध्यें मी आठवण देऊन
तुमच्या सात्विक मनाला जागृत करितों; २ यासाठीं
कीं पवित्र संदेष्ट्यांनीं पूर्वीं सांगितलेल्या वचनांची, आणि
प्रभु व तारणारा यानें तुमच्या प्रेषितांच्या द्वारें दिलेल्या
आज्ञेची आठवण तुम्हीं करावी; ३ हें प्रथम मनांत आणा-
वयाचें कीं शेवटल्या दिवसांत आपल्याच वासनांप्रमाणें
चालणारे थट्टेखोर लोक थट्टा करीत येऊन म्हणतील: ४
त्याच्या येण्याचें वचन आतां कोठें आहे? कारण वाड-
वडील निजले तेव्हांपासून, उत्पत्तीच्या प्रारंभापासून, जसें
चालू आहे तसेंच सर्व कांहीं राहिलें आहे. ५ हें तर ते
बुद्धिपुरःसर विसरतात कीं पूर्वीं देवाच्या शब्दानें आकाश
आणि पाण्यांतून व पाण्याच्या योगें घडलेली अशी पृथ्वी
हीं झालीं; ६ त्याच्या योगें तेव्हांच्या जगाचा पाण्यानें
बुडून नाश झाला; ७ पण आतांचें आकाश व पृथ्वी हीं
त्याच शब्दानें अग्नीसाठीं राखलेलीं आहेत; म्हणजे
न्यायनिवाड्याचा व अधार्मिक लोकांच्या नाशाचा दिवस
येईपर्यंत, शिलक ठेविलेलीं आहेत.

८ तरी प्रिय बंधूंनो, ही एक गोष्ट तुम्ही विसरूं नका
कीं 'प्रभूला' एक दिवस हजार वर्षांसारिखा, आणि
'हजार वर्षें' एका 'दिवसासारखीं' आहेत. ९ कित्येक
लोक ज्याला विलंब म्हणून म्हणतात तसा विलंब प्रभु
आपल्या वचनाविषयीं करीत नाहीं, तर तो तुमचें सहन
करितो; कोणाचा नाश व्हावा अशी त्याची इच्छा नाहीं,
तर सर्वांनीं पश्चात्ताप करावा अशी आहे. १० तरी प्रभूचा
दिवस चोरासारखा येईल; त्या दिवशीं आकाश मोठा नाद
करीत सरून जाईल, सृष्टितत्वें तप्त होऊन लयास जातील,
आणि पृथ्वी व तिजवरील गोष्टी उघडकीस येतील.

## तयारी ठेवण्याची आवश्यकता

११ तर हीं सर्व अशीं लयास जाणारीं आहेत म्हणून
पवित्र वर्तणुकींत व सुभक्तींत राहून देवाचा दिवस येण्याची
वाट पाहत व तो दिवस लवकर यावा म्हणून खटपट करीत
तुम्हीं कसें असलें पाहिजे? १२ त्या दिवसामुळें 'आकाश'
जळून लयास जाईल आणि सृष्टितत्वें तप्त होऊन
'वितळतील.' १३ तरी ज्यामध्यें धार्मिकता वास करिते
असें 'नवें आकाश' व 'नवी पृथ्वी' यांची त्याच्या
वचनाप्रमाणें आपण वाट पाहत आहों.

१४ यास्तव प्रिय बंधूंनो, ह्या गोष्टींची अपेक्षा करीत
असतां, तुम्हीं त्याच्या दृष्टीनें निष्कलंक व निर्दोष असें
शांतींत असलेलें आढळावें म्हणून होईल तितके प्रयत्न
करा. १५ आपल्या प्रभूची सहनता तारणच आहे असें
समजा; आपला प्रिय बंधु पौल याला दिलेल्या ज्ञानाप्रमाणें
त्यानेंहि तुम्हांस असेंच लिहिलें आहे; १६ आणि त्यानें
आपल्या सर्व पत्रांत ह्या गोष्टींचा उल्लेख केला आहे. त्यांत
समजावयास कठीण अशा कांहीं गोष्टी आहेत; त्यांचा अर्थ

अज्ञानी व अस्थिर मनुष्यें इतर शास्त्रलेखांचा विपरीत अर्थ
करितात तसा त्यांचाहि ओढूनताणून करितात; त्यापासून
त्यांचा नाश होणार. १७ तर प्रिय बंधूंनो, या गोष्टी
तुम्हांला पूर्वीपासून कळत आहेत, म्हणून तुम्हीं अधर्मी
लोकांच्या भ्रांतिप्रवाहांत सांपडून आपल्या स्थिरतेंतून ढळूं
नये यासाठीं जपा; १८ आणि आपला प्रभु व तारणारा
येशू ख्रिस्त याच्या कृपेंत व ज्ञानांत वाढा. त्याला आतां व
अनंतकालपर्यंत गौरव असो. आमेन.

# योहानाचें पहिलें पत्र



### ख्रिस्तामध्यें प्रकट झालेलें सार्वकालिक जीवन

१, २ जें प्रारंभापासून होतें, जें आम्हीं ऐकलें
१ आहे, जें आम्हीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलें आहे,
जें आम्हीं न्याहाळिलें व स्वहस्तें चाचपिलें, त्या
जीवनाच्या शब्दाविषयीं आम्ही सांगतों. तें जीवन प्रकट
झालें, तें आम्हीं पाहिलें आहे, व त्याची साक्ष देतों; तें
सार्वकालिक जीवन पित्याजवळ होतें व आम्हांस प्रकट
झालें, हें तुम्हांस कळवितों; ३ जें आम्हीं पाहिलें व ऐकलें
आहे तें तुम्हांसहि यासाठीं कळवितों कीं तुमचीहि आम्हां-
बरोबर भागी व्हावी; आपली भागी तर पित्याबरोबर व
त्याचा पुत्र येशू ख्रिस्त याजबरोबर आहे; ४ तुमचाआमचा
आनंद पूर्ण व्हावा म्हणून आम्ही हें लिहितों.

### देवसहवास म्हणजे पापाचा त्याग

५ जो निरोप आम्हीं त्याजपासून ऐकला आहे तो तुम्हांस
सांगतों; तो हाच कीं देव प्रकाश आहे, त्याच्या ठायीं
मुळींच अंधार नाहीं. ६ त्याच्याबरोबर आपली भागी आहे
असें जर आपण म्हणतों आणि अंधारांत चालतों तर
आपण खोटें बोलतों, सत्यानें वागत नाहीं; ७ पण
जसा तो प्रकाशांत आहे तसे जर आपण प्रकाशांत
चालतों, तर आपली एकमेकांबरोबर भागी आहे;
आणि त्याचा पुत्र येशू यांचें रक्त आपल्याला सर्व
पापांपासून शुद्ध करितें. ८ आपल्याला पाप नाहीं
असें जर आपण म्हणतों, तर आपण स्वतःला
फसवितों, व आपल्या ठायीं सत्य नाहीं. ९ जर आपण
स्वतःचीं पापें पदरीं घेतों, तर तो विश्वासू व न्यायी आहे
म्हणून आपल्या पापांची क्षमा करील, व आपल्याला सर्व
अधर्मापासून शुद्ध करील. १० आम्हीं पाप केलें नाहीं,
असें जर आपण म्हणतों, तर आपण त्याला लबाड करितों,
आणि त्याचें वचन आपल्या ठायीं नाहीं.

१ अहो माझ्या मुलांनो, तुम्हीं पाप करूं नये
२ म्हणून हें मी तुम्हांस लिहितों. जर कोणीं पाप केलेंच,
तर धार्मिक असा जो येशू ख्रिस्त तो पित्याजवळ
आपला कैवारी आहे; २ तोच आपल्या पापांबद्दल प्राय-
श्चित्त आहे; आणि आपल्याच पापांबद्दल केवळ नव्हे तर
सर्व जगाच्याहि पापांबद्दल आहे.

### आज्ञांकितपण हें देवसहवासाचें प्रमाण होय

३ आपण त्याच्या आज्ञा पाळिल्या म्हणजे आपण
त्याला ओळखलों हें आपणांस कळून येतें. ४ मला त्याचें
ज्ञान आहे असें म्हणून त्याच्या आज्ञा जो मानीत नाहीं तो
लबाड आहे, त्याच्या ठायीं सत्य नाहीं. ५ जो कोणी
त्याचें वचन पाळितो त्याच्यामध्यें देवाची प्रीति खरोखर
पूर्ण झाली आहे. यावरून आपल्याला कळून येतें कीं
आपण त्याच्या ठायीं आहों. ६ मी त्याजमध्यें राहतों, असें
म्हणणाऱ्यानें तो चालला तसें स्वतःहि चाललें पाहिजे.

७ प्रियजनहो, मी तुम्हांस नवी आज्ञा लिहीत नाहीं;
जी प्रारंभापासून तुम्हांस दिलेली जुनी आज्ञा तीच
लिहितों; जें वचन तुम्हीं ऐकलें तें ती जुनी आज्ञा आहे.
८ मी पुनः तुम्हांस ती आज्ञा नवी अशी लिहितों; ती
त्याच्या व तुमच्यासंबंधानें खरोखर तशीच आहे; कारण
अंधार नाहींसा होत आहे, व खरा प्रकाश प्रकाशत आहे

९ मी प्रकाशांत आहें असें म्हणून जो आपल्या बंधूचा द्वेष करितो तो अजून अंधारांतच आहे. १० आपल्या बंधूवर प्रीति करणारा प्रकाशांत राहतो, आणि त्याच्या ठायीं अडखळण नसतें; ११ पण आपल्या बंधूचा द्वेष करणारा अंधारांत आहे व अंधारांत चालतो; तो कोठें जातो हें त्याचें त्याला ठाऊक नसतें, कारण अंधारानें त्याचे डोळे अंधळे केलेले आहेत.

१२ मुलांनो, मी तुम्हांस लिहितों, कारण त्याच्या नामामुळें तुमच्या पापांची तुम्हांस क्षमा झाली आहे. १३ बापांनो, मी तुम्हांस लिहितों, कारण जो प्रारंभापासून आहे त्याचें ज्ञान तुम्हांस झालें आहे. तरुणांनो, मी तुम्हांस लिहितों, कारण दुष्टाला तुम्हीं जिंकलें आहे. मुलांनो, मीं तुम्हांस लिहिलें आहे, कारण तुम्हांस पित्याचें ज्ञान झालें आहे. १४ बापांनो, मीं तुम्हांस लिहिलें आहे, कारण जो प्रारंभापासून आहे त्याचें ज्ञान तुम्हांस झालें आहे. तरुणांनो, मीं तुम्हांस लिहिलें आहे, कारण तुम्ही सबळ आहां, तुम्हांमध्यें देवाचें वचन राहतें, आणि त्या दुष्टाला तुम्हीं जिंकिलें आहे. १५ जगावर व जगांतल्या गोष्टींवर प्रीति करूं नका. जर कोणी जगावर प्रीति करितो तर त्याच्या ठायीं पित्याची प्रीति नाहीं. १६ कारण जगांत जें सर्व आहे तें, म्हणजे देहाची वासना, डोळ्यांची वासना व संसाराची फुशारकी, हीं पित्यापासून नाहींत; तर जगापासून आहेत; १७ आणि जग व त्याची वासना हीं नाहींतशीं होत आहेत; पण देवाच्या इच्छेप्रमाणें करणारा सर्वकाळ राहतो.

## ख्रिस्तविरोध्यांच्या बाबतींत इशारे

१८ मुलांनो, ही शेवटली घटका आहे, आणि ख्रिस्तविरोधी येणार असें तुम्हीं ऐकलें त्याप्रमाणें आतांच पुष्कळ ख्रिस्तविरोधी उठले आहेत; यावरून आपल्याला दिसून येतें कीं ही शेवटली घटका आहे. १९ ते आपल्यांतूनच निघाले तरी ते आपले नव्हते; ते आपले असते तर आपल्याबरोबर राहिले असते; त्यांच्यांतील कोणी आपला नाहीं हें प्रकट व्हावें म्हणून ते निघाले. २० तुम्हांला पवित्र प्रभूपासून अभिषेक झाला आहे; तुम्हांला सर्व गोष्टी कळतात. २१ तुम्हांला सत्य कळत नाहीं म्हणून मीं तुम्हांला लिहिलें आहे असें नाहीं; तुम्हांला तें कळतें आणि कोणतेंहि असत्य सत्यापासून नाहीं, म्हणून लिहिलें आहे. २२ येशू हा ख्रिस्त आहे हें जो नाकारितो त्याशिवाय लबाड कोण आहे? जो पित्याला व पुत्राला नाकारितो तोच ख्रिस्तविरोधी आहे. २३ जो कोणी पुत्राला नाकारितो त्याला पिता नाहीं; जो पुत्राला स्वीकारतो त्याला पिता आहे. २४ तुमच्याविषयीं म्हटल्यास, जें तुम्हीं प्रारंभापासून ऐकलें तें तुम्हांमध्यें राहो. जें तुम्हीं प्रारंभापासून ऐकलें तें जर तुम्हांमध्यें राहिलें तर तुम्हीहि पुत्रामध्यें व पित्यामध्यें राहाल. २५ जें वचन त्यानें स्वतः आपल्याला दिलें तें सार्वकालिक जीवन होय. २६ तुम्हांस बहकविणाऱ्या लोकांविषयीं हें मीं तुम्हांस लिहिलें आहे. २७ तुम्हांविषयीं म्हटल्यास, तुम्हांस त्याजपासून जो अभिषेक झाला तो तुम्हांमध्यें राहतो, आणि तुम्हांला कोणीं शिकवावें याची गरज नाहीं; त्याचा अभिषेक तुम्हांस सर्वांविषयीं शिकवितो; तो सत्य आहे, असत्य नाहीं; म्हणून त्यानें तुम्हांस शिकविल्याप्रमाणें तुम्ही त्यामध्यें राहतां. २८ तर आतां मुलांनो, त्यामध्यें राहा, यासाठीं कीं तो प्रकट होईल तेव्हां आपल्याला धैर्य असावें, आणि त्याच्या येण्याच्या वेळेस त्याजपासून लाजेनें माघार घ्यावी लागूं नये. २९ तो नीतिमान् आहे असें जर तुम्हांस माहीत आहे तर जो कोणी नीतीनें चालतो तो त्याजपासून जन्मलेला आहे हेंहि तुम्हांला माहीत झालें आहे.

## देवपित्यावर प्रेम केल्यानें मनुष्य सन्मार्गवर्ति बनतो

३ १ आपल्याला देवाचीं मुलें हें नांव मिळालें यांत पित्यानें आपल्याला केवढें प्रीतिदान दिलें आहे तें पाहा; आणि आपण तसें आहोंच. यामुळें जग आपल्याला ओळखीत नाहीं, कारण त्यानें त्याला ओळखलें नाहीं. २ प्रियजनहो, आपण आतां देवाचीं मुलें आहों; आणि पुढें आपण काय होऊं हें अजून प्रकट झालें नाहीं; तरी आपल्याला हें माहीत आहे कीं तो प्रकट झाल्यास आपण त्यासारखे होऊं, कारण जसा तो आहे तसाच तो आपल्याला दिसेल. ३ ज्या कोणाला त्यासंबंधानें ही आशा आहे तो, जसा तो शुद्ध आहे तसा, आपणाला

शुद्ध करितो.

### ईश्वरी पुत्रत्व व पाप यांचा विरोध आहे

४ जो कोणी पाप करितो तो स्वैरवर्तन करितो; पाप हें
स्वैरवर्तन आहे. ५ तुम्हांला हें माहीत आहे कीं पापें हरण
करावीं म्हणून तो प्रकट झाला; त्याच्या ठायीं पाप नाहीं;
६ जो कोणी त्याच्या ठायीं राहतो तो पाप करीत नाहीं; जो
कोणी पाप करितो त्यानें त्याला पाहिलें नाहीं व त्याला
ओळखलेंहि नाहीं. ७ मुलांनो, कोणीं तुम्हांस बहकवूं नये;
जसा तो नीतिमान् आहे तसा नीतीनें वागणारा इसमहि
नीतिमान् आहे. ८ जो पाप करितो तो सैतानापासून
आहे; कारण सैतान प्रारंभापासून पाप करीत आहे.
सैतानाचीं कृत्यें नष्ट करावीं यासाठींच देवाचा पुत्र प्रकट
झाला; ९ जो कोणी देवापासून जन्मला आहे तो पाप
करीत नाहीं; कारण त्याचें बीज त्याजमध्यें राहतें; त्याच्यानें
पाप करवत नाहीं, कारण तो देवापासून जन्मला आहे.
१० यावरून देवाचीं मुलें व सैतानाचीं मुलें उघड होतात.
जो कोणी नीतीनें वागत नाहीं तो देवापासून नाहीं, व जो
आपल्या बंधूवर प्रीति करीत नाहीं तोहि नाहीं. ११ जो
संदेश तुम्हीं प्रारंभापासून ऐकला तो हाच आहे कीं आपण
एकमेकांवर प्रीति करावी; १२ जसा काइन त्या दुष्टाचा
होता व त्यानें आपल्या बंधूचा वध केला तसें आपण
नसावें. त्यानें त्याचा वध कशासाठीं केला? त्याचीं कृत्यें
दुष्ट होतीं आणि त्याच्या बंधूचीं नीतीचीं होतीं यामुळें
केला.

### बंधुप्रेम

१३ बंधूंनो, जग तुमचा द्वेष करितें याचें आश्चर्य मानूं
नका. १४ आपण बंधुवर्गावर प्रीति करितों यावरून आपण
समजतों कीं आपण मरणांतून निघून जीवनांत आलों आहों.
जो प्रीति करीत नाहीं तो मरणांत राहतो. १५ जो कोणी
आपल्या बंधूचा द्वेष करितो तो नरहिंसक आहे; आणि
कोणाहि नरहिंसकाच्या ठायीं सार्वकालिक जीवन राहत
नाहीं, हें तुम्हांस माहीत आहे. १६ त्यानें आपल्याकरितां
स्वप्राण अर्पिला यावरून आपल्याला प्रीतीचें ज्ञान झालें
आहे; म्हणून आपणहि आपल्या बंधूंकरितां स्वप्राण अर्पिला
पाहिजे. १७ तर मग आपल्याजवळ संसाराचीं साधनें
असून व आपला बंधु गरजवंत आहे हें पाहून जो स्वतःला
त्याबद्दल कळवळा येऊं देत नाहीं त्याच्या ठायीं देवाची
प्रीति कशी राहते? १८ मुलांनो, आपल्या शब्दांनीं
किंवा जिव्हेनें नव्हे, तर कृतीनें व सत्यानें आपण प्रीति
करावी. १९, २० आपण सत्याचे आहों हें यावरून
आपल्याला समजेल; आणि ज्या कशाविषयीं आपलें मन
आपल्या स्वतःला दोषी ठरवितें त्याविषयीं आपण
स्वतःच्या मनाला त्याजसमोर उमेद देऊं; कारण देव
आपल्या मनापेक्षां थोर आहे; त्याला सर्व कांहीं कळतें.
२१ प्रियजनहो, आपलें मन आपल्याला दोषी ठरवीत
नसेल तर आपल्याला देवासमोर धैर्य आहे. २२ आणि
आपण जें कांहीं मागतों तें त्याजपासून आपल्याला मिळतें;
कारण आपण त्याच्या आज्ञा पाळितों, व त्याच्या
दृष्टीनें जें आवडतें तें करितों. २३ ही त्याची आज्ञा
आहे कीं त्याचा पुत्र येशू ख्रिस्त याच्या नामावर आपण
विश्वास ठेवावा; आणि त्यानें आपल्याला आज्ञा दिल्या-
प्रमाणें आपण एकमेकांवर प्रीति करावी. २४ त्याच्या आज्ञा
पाळणारा इसम त्याच्या ठायीं राहतो व तो त्या इसमाच्या
ठायीं राहतो. त्यानें जो आत्मा आपल्याला दिला, त्यावरून
आपल्याला कळतें कीं तो आपल्या ठायीं राहतो.

### ईश्वरी प्रेरणेची कसोटी

४ १ प्रियकरांनो, प्रत्येक आत्म्याचा विश्वास धरूं
नका, तर ते आत्मे देवापासून आहेत किंवा नाहींत
याविषयीं त्यांची परीक्षा करा; कारण पुष्कळ खोटे
संदेष्टे जगांत उठले आहेत. २ जो जो आत्मा, देह धरून
आलेल्या येशू ख्रिस्ताला कबूल करितो तो तो देवापासून
आहे; यावरून देवाचा आत्मा ओळखावा. ३ जो जो
आत्मा येशूला कबूल करीत नाहीं तो तो देवापासून नाहीं.
ख्रिस्तविरोध्याचा विरोध हाच आहे; तो येणार आहे हें
तुम्हीं ऐकलें आणि तो जगांत आतां आहेच. ४ मुलांनो,
तुम्ही देवापासून आहां आणि त्यांजवर तुम्हीं जय मिळ-
विला आहे; कारण जगांत जो आहे त्यापेक्षां तुम्हांत जो
आहे तो मोठा आहे. ५ ते जगाचे आहेत म्हणून त्यांचें
भाषण ऐहिक आहे, आणि जग त्यांचें ऐकून घेतें.
६ आपण देवापासून आहों; जो देवाला ओळखतो तो

आपलें ऐकतो; जो देवापासून नाहीं तो आपलें ऐकत
नाहीं. यावरून सत्याचा आत्मा कोणता व भ्रांतीचा
आत्मा कोणता हें आपण ओळखितों.

## देवावरचें प्रेम व एकमेकांवरचें प्रेम

७ प्रियजनहो, आपण एकमेकांवर प्रीति करूं; कारण
प्रीति देवापासून आहे; जो कोणी प्रीति करितो तो
देवापासून जन्मला आहे, व देवाला ओळखतो. ८ जो
प्रीति करीत नाहीं तो देवाला ओळखीत नाहीं; कारण देव
प्रेमस्वरूप आहे. ९ देवानें आपल्या एकुलत्या एक पुत्राला
जगांत पाठविलें आहे, यासाठीं कीं आपण त्याच्या द्वारें
जीवंत राहावें; यामध्यें देवाची प्रीति आपल्या ठायीं प्रकट
झाली. १० प्रीति म्हणावी तर हीच; आपण देवावर प्रीति
केली असें नाहीं, तर त्यानें तुम्हांआम्हांवर प्रीति केली
आणि स्वपुत्राला आपल्या पातकांचें प्रायश्चित्त व्हावें
म्हणून पाठविलें. ११ प्रियजनहो, जर देवानें आपल्यावर
अशा प्रकारें प्रीति केली तर आपणहि एकमेकांवर प्रीति
केली पाहिजे. १२ देवाला कोणीं कधींहि पाहिलें नाहीं;
आपण एकमेकांवर प्रीति करितों तर देव आपल्या ठायीं
राहतो, आणि त्याची प्रीति आपल्या ठायीं पूर्ण होते;
१३ आपण त्यामध्यें व तो आपल्यामध्यें राहतो, हें
आपण यावरून ओळखतों कीं त्यानें स्वतःच्या आत्म्यांतून
आपल्यास दिलें आहे; १४ आम्ही पाहिलें आहे व साक्ष
देतों कीं पित्यानें पुत्राला जगाचा तारणारा असें पाठविलें
आहे. १५ येशू देवाचा पुत्र आहे, असें जो कोणी कबूल
करितो त्याच्या ठायीं देव राहतो; व तो देवाच्या ठायीं
राहतो. १६ देवाला आपल्याविषयीं जी प्रीति आहे ती
आपल्याला कळते व आपण तिच्यावर विश्वास ठेविला
आहे. देव प्रेमस्वरूप आहे; जो प्रीतीमध्यें राहतो तो
देवामध्यें राहतो, व देव त्यामध्यें राहतो. १७ न्यायाच्या
दिवसासंबंधानें आपल्या ठायीं धैर्य उत्पन्न व्हावें म्हणून
त्याची प्रीति आपल्यामध्यें अशी पूर्ण झाली आहे; कारण
जसा तो आहे तसे या जगांत आपणहि आहों; १८
प्रेमाच्या ठायीं भीति नसते; इतकेंच नव्हे तर पूर्ण प्रीति
भीतीला घालवून देते; भीतीमध्यें शासन असतें, आणि
भीति बाळगणारा प्रीतीमध्यें पूर्ण झालेला नसतो. १९ त्यानें
पहिल्यानें आपणांवर प्रीति केली, म्हणून आपण प्रीति
करितों. २० मी देवावर प्रीति करितों, असें म्हणून जो
कोणी आपल्या बंधूचा द्वेष करितो तो लबाड आहे; कारण
आपल्या बंधूला पाहिलें असून त्याजवर जो प्रीति करीत
नाहीं त्याच्यानें, न पाहिलेल्या देवावर प्रीति करवत नाहीं.
२१ जो देवावर प्रीति करितो त्यानें आपल्या बंधूवरहि
प्रीति करावी, ही आज्ञा त्याजपासून आपल्याला आहे.

## ख्रिस्तशिष्याची श्रद्धा

१ येशू हा ख्रिस्त आहे, असा विश्वास जो कोणी
५ धरितो तो देवापासून जन्मला आहे; आणि जो कोणी
जन्मदात्यावर प्रीति करितो, तो त्याजपासून जन्मलेल्या
इसमावरहि प्रीति करितो. २ आपण देवावर प्रीति करितों
व त्याच्या आज्ञा पाळितों तर त्यावरून आपल्याला कळतें
कीं आपण देवाच्या लेकरांवर प्रीति करितों. ३ देवावर
प्रीति करणें म्हणजे आपण त्याच्या आज्ञा पाळणें हें
आहे; आणि त्याच्या आज्ञा भारी नाहींत. ४ कारण जें
कांहीं देवापासून जन्मलेलें आहे तें जगावर जय मिळवितें;
आणि ज्यानें जगावर जय मिळविला तो हाच आपला
विश्वास आहे. ५ येशू देवाचा पुत्र आहे असा विश्वास
जो धरितो त्याजवांचून जगावर जय मिळविणारा कोण
आहे? ६ जो पाण्याच्या द्वारें व रक्ताच्या द्वारें आला तो
हाच, म्हणजे येशू ख्रिस्त; पाण्यानें केवळ नव्हे,
तर पाण्यानें व रक्तानेंहि आला. ७ साक्ष देणारा हा आत्मा
आहे, कारण आत्मा सत्य आहे. ८ साक्ष देणारे तिघे
आहेत: आत्मा, पाणी व रक्त; ह्या तिघांची साक्ष एकच
आहे. ९ आपण मनुष्यांची साक्ष स्वीकारितों, पण तिज-
पेक्षां देवाची साक्ष मोठी आहे. जी साक्ष देवानें
आपल्या पुत्राविषयीं दिली ती हीच त्याची साक्ष
आहे. १० जो देवाच्या पुत्रावर विश्वास ठेवितो
त्याच्या ठायींच साक्ष आहे; ज्यानें देवाचा विश्वास धरिला
नाहीं त्यानें त्याला लबाड केलें आहे; कारण जी साक्ष
देवानें आपल्या पुत्राविषयीं दिली आहे तिच्यावर त्यानें
विश्वास ठेविला नाहीं. ११ ती साक्ष हीच आहे कीं देवानें
आपल्याला सार्वकालिक जीवन दिलें आणि हें जीवन
त्याच्या पुत्रामध्यें आहे. १२ ज्याला तो पुत्र आहे त्याला

जीवन आहे; ज्याला देवाचा पुत्र नाहीं त्याला जीवन नाहीं.

### समाप्ति

१३ सार्वकालिक जीवन तुम्हांस आहे हें तुम्हांस कळावें म्हणून देवाच्या पुत्राच्या नामावर विश्वास ठेवणाऱ्या तुम्हांस हें मीं लिहिलें आहे. १४ त्याविषयीं आपल्याला जो भरवसा आहे तो हा आहे कीं आपण त्याच्या इच्छेप्रमाणें कांहीं मागितलें तर तो आपलें ऐकेल; १५ आपण मागतों त्याविषयीं तो आपलें ऐकतो, हें आपल्याला ठाऊक आहे; म्हणून जीं मागणीं आपण त्याच्याजवळ मागितलीं आहेत तीं आपल्याला मिळालीं आहेत हेंहि आपल्याला ठाऊक आहे. १६ ज्याचा परिणाम मरण नाहीं असें पाप करितांना आपल्या बंधूला कोणी पाहील तर त्यानें त्याच्याकरितां मागितलें असतां तो त्याला जीवन मिळवून देईल; म्हणजे ज्याचा परिणाम मरण नाहीं असें पाप करणाऱ्यांस तें मिळवून देईल. ज्याचा परिणाम मरण आहे असें पाप आहे; त्याविषयीं मागावें असें मी म्हणत नाहीं. १७ कोणतीहि अनीति पाप आहे; आणि त्यांत ज्याचा परिणाम मरण नाहीं असेंहि पाप आहे.

१८ जो कोणी देवापासून जन्मला आहे तो पाप करीत नाहीं हें आपल्याला माहीत आहे; जो देवापासून जन्मला तो त्याला राखितो आणि तो दुष्ट त्याला शिवत नाहीं. १९ आपण देवापासून आहों, हें आपल्याला माहीत आहे; सगळें जग त्या दुष्टाच्या अधीन आहे. २० आपल्याला माहीत आहे कीं देवाचा पुत्र आला आहे, आणि जो सत्य आहे त्याचें ज्ञान करून घेण्याची बुद्धि आपल्याला दिली आहे; जो सत्य त्यामध्यें, म्हणजे त्याचा पुत्र येशू ख्रिस्त यामध्यें, आपण आहों. हाच खरा देव; हें सार्वकालिक जीवन आहे. २१ मुलांनो, तुम्ही स्वतःस मूर्तींपासून दूर राखा.

# योहानाचें दुसरें पत्र

१, २ निवडलेली कुरियाबाई[1] व तिचीं मुलें यांस, वडील[2] याजकडून: जें सत्य आपल्या ठायीं असतें व आपल्याबरोबर सर्वकाळ राहील, त्या सत्यामुळें तुम्हांवर मी खरी प्रीति करितों; आणि मी केवळ नव्हे तर सत्य म्हणजे काय हें जे समजतात ते सर्वहि करितात. ३ देवपित्यापासून व पित्याचा पुत्र येशू ख्रिस्त याजपासून कृपा, दया व शांति हीं या सत्यांत व प्रीतींत आपल्याबरोबर राहतील.

४ आपल्याला पित्यापासून आज्ञा मिळाल्याप्रमाणें तुझ्या मुलांपैकीं कित्येक सत्यानें चालत असलेलीं मला आढळलीं आहेत, याचा मला अतिशय आनंद झाला. ५ आतां बाई, नवी आज्ञा नव्हे, तर जी आपल्याला प्रारंभापासून दिलेली आहे ती लिहून तुला विनंति करितों कीं आपण एकमेकांवर प्रीति करावी. ६ ती प्रीति ही आहे कीं आपण त्याच्या आज्ञांप्रमाणें चालावें. ती आज्ञा ही आहे कीं तुम्हीं तिच्याप्रमाणें चालावें; हेंहि तुम्हीं प्रारंभापासून ऐकलें. ७ फसविणारीं पुष्कळ माणसें, म्हणजे येशू ख्रिस्त देहानें येतो हें कबूल न करणारीं माणसें, जगांत उठलीं आहेत. अशा प्रकारें फसविणारा हा ख्रिस्तविरोधी आहे. ८ जें आम्हीं केलें तें तुम्हीं व्यर्थ जाऊं देऊं नये, तर त्याचें पूर्ण प्रतिफळ मिळावें म्हणून स्वतःला जपावें. ९ ख्रिस्ताचें शिक्षण धरून न राहतां जो पुढेंपुढें जातो त्याला देव नाहीं; जो शिक्षण धरून

१ हें एका स्त्रीचें नांव असावें.
२ मुळांत: प्रेस्बुतर.

राहतो त्याला पिता व पुत्रहि आहे. १० हें शिक्षण
न देणारा असा कोणी तुम्हांकडे आला तर त्याला
घरांत घेऊं नका व त्याचें स्वागत करूं नका; ११
कारण जो त्याचें स्वागत करितो तो त्याच्या दुष्क-
र्मांचा भागीदार होतो.

१२ मला तुम्हांस पुष्कळ लिहावयाचें होतें, तें
कागद व शाई यांनीं लिहावेंसें वाटलें नाहीं; तर
तुम्हांकडे येऊन मला समक्ष बोलतां येईल अशी मी आशा
बाळगितों; म्हणजे तुमचा आनंद परिपूर्ण होईल. १३
तुझ्या निवडलेल्या बहिणीचीं मुलें तुला सलाम सांगतात.

# योहानाचें तिसरें पत्र



१ ज्यावर मी खरी प्रीति करितों तो प्रिय गायस यास,
वडील याजकडून :

२ प्रिय बंधो, जसा तुझा आत्मा सुस्थितींत आहे तसें
तुला सर्व गोष्टींत सुस्थिति व आरोग्य असावें, अशी मी
प्रार्थना करितों. ३ कारण तूं सत्यानें चालतोस अशी तुझ्या
सत्याविषयीं बंधुजनांनीं येऊन साक्ष दिली, त्यावरून मला
अत्यानंद झाला. ४ माझीं मुलें सत्यांत चालतात, हें ऐक-
ल्यानें मला आनंद होतो तितका दुसऱ्या कशानेंहि होत
नाहीं.

५ प्रिय बंधो, परकीय बंधुजनांसाठीं तूं जें कांहीं करि-
तोस तें तुझें करणें विश्वासाचें आहे; ६ त्यांनीं मंडळीसमोर
तुझ्या प्रीतीविषयीं साक्ष दिली; त्यांस तूं, देवाला योग्य
दिसेल अशा रीतीनें वाटेस लावशील तर बरें करशील;
७ कारण ते विदेशी लोकांपासून कांहींएक न घेतां त्या
‘नामासाठीं’ बाहेर निघाले. ८ यास्तव आपण अशांचें
स्वागत करावें, म्हणजे आपण सत्यामध्यें त्यांचे
सहकारी होऊं.

९ मीं मंडळीला थोडेंसें लिहिलें; परंतु तिजमध्यें
अग्रगण्य होण्याची आवड धरणारा दियत्रफेस हा आमचा
स्वीकार करीत नाहीं. १० यामुळें, मी आलों तर तो जीं
कर्मे करितो त्यांची आठवण देईन; तो आम्हांविरुद्ध अप-
शब्द बोलून बडबड करितो; तेवढ्यानें त्याचें समाधान न
होतां तो बंधुजनांना स्वीकार करीत नाहीं, आणि जे त्यांचा
स्वीकार करावयास पाहतात त्यांस तो मना करितो व
मंडळीबाहेर घालवितो. ११ प्रिय बंधो, वाइटाला अनुसरूं
नको, तर चांगल्याला अनुसर. चांगलें करणारा देवापासून
आहे, वाईट करणाऱ्याला देव दिसला नाहीं. १२ देमेत्रि-
याविषयीं सर्वांनीं व स्वत: सत्यानेंहि चांगली साक्ष दिली
आहे; आम्हीहि साक्ष देतों; आणि आमची साक्ष खरी
आहे हें तुला ठाऊक आहे.

१३ मला तुला पुष्कळ लिहावयाचें होतें, तें शाई व
लेखणी यांनीं तुला लिहिण्याची इच्छा नाहीं; १४ तर मी
तुला लवकर भेटेन, अशी मला आशा आहे. तेव्हां आपण
समक्ष बोलूं. तुला शांति असो. मित्रमंडळी तुला सलाम
सांगतात. मित्रमंडळींना ज्याच्या त्याच्या नांवानें सलाम
सांग.

# यहूदाचें पत्र



### नमस्कार

१ देवपित्याच्या ठायीं प्रिय आणि येशू ख्रिस्तासाठीं
राखून ठेवण्यांत आलेले असे जे पाचारिलेले लोक त्यांस
येशू ख्रिस्ताचा दास व याकोबाचा बंधु यहूदा याजकडून :
२ दया, शांति व प्रीति ही तुम्हांस विपुल मिळोत

### खोटे शिक्षक व नैतिक अधःपात यांबाबत सूचना

३ प्रिय बंधूंनो, आपल्या सर्वसाधारण तारणाविषयीं
तुम्हांस लिहावयाची मला मोठी आस्था लागली होती,
तरी पवित्र जनांच्या एकदाच स्वाधीन केलेल्या विश्वासाचें
समर्थन करण्यासंबंधीं बोध तुम्हांस लिहून पाठविण्याचें
मला अगत्य वाटलें. ४ कारण या दंडासाठीं पूर्वींच नेम-
लेलीं कित्येक मनुष्यें नकळत आंत शिरलीं आहेत; तीं
अभक्तीनें वागणारीं मनुष्यें आपल्या देवाची कृपा पालटून
तिला कामातुरपणाचें स्वरूप आणितात; आणि आपला
एकच स्वामी व प्रभु येशू ख्रिस्त याला ते नाकारितात.
५ तुम्हांला हें सर्व ठाऊकच आहे, तरी तुम्हांला त्याची
आठवण करून द्यावी असें वाटतें; तें हें कीं प्रभूनें मिसर
देशांतून एका राष्ट्राचा निभाव केला, आणि मग जे विश्वास
न ठेवणारे होते त्यांचा नाश केला. ६ ज्या देवदूतांनीं
आपलें उच्च पद न राखतां स्वस्थान सोडिलें, त्यांस त्यानें
सार्वकालिक बंधनांत, निबिड काळोखामध्यें, महान् दिवसाच्या
न्यायाकरितां राखून ठेविलें. ७ त्याप्रमाणेंच सदोम व गमोरा
आणि त्यांच्या सभोंवतालचीं नगरें ह्यांनीं त्यांसारखें जार-
कर्म करून विजातीय अंगांशीं संग केला; तीं नगरें सार्व-
कालिक अग्निदंड भोगीत उदाहरणादाखल पुढें ठेविलीं
आहेत. ८ तसेंच हे देखील निद्रावस्थेत देहाला विटाळ-
वितात, प्रभुत्व तुच्छ लेखितात, व थोर अधिकाऱ्यांची निंदा
करितात. ९ 'आद्य देवदूत मीखाएल' हा जेव्हां मोशाच्या
शरीरासंबंधानें सैतानाशीं वाद घालितांना भांडला तेव्हां
त्याला दोषी ठरवून त्याची निंदा करावयास त्याचा हिय्या
झाला नाहीं; तर 'प्रभु तुला धमकावो' एवढें तो म्हणाला.
१० तथापि ज्या गोष्टी हे समजत नाहींत त्यांची हे निंदा
करितात; आणि बुद्धिहीन पशूंप्रमाणें ज्या गोष्टी हे स्वभावतः
समजतात त्यांच्या योगें हे आपला नाश करून घेतात. ११
त्यांस धिक्कार असो! कारण ते काइनाच्या मार्गानें चालले,
द्रव्यासाठीं बलामाच्या भ्रांतिमार्गांत बेफामपणें घुसले, आणि
कोरहासारखें बंड करून त्यांनीं आपला नाश करून घेतला.
१२ ते तुम्हांबरोबर जेवितात तेव्हां तुमच्या प्रीतिभोजनांत
झाकलेले खडक असे आहेत; ते मेंढपाळ असून जेवितांना
खुशालपणें 'आपली धण घेतात;' ते वाऱ्यानें वाहून नेलेले
निर्जल मेघ, हेमंत ऋतूंतील फलहीन, दोनदा मेलेलीं,
समूळ उपटलेलीं झाडें, असे आहेत; १३ लज्जारूपी फेस
दाखविणाऱ्या समुद्राच्या विक्राळ लाटा, भ्रमण करणारे तारे,
असे ते आहेत; त्यांजसाठीं निबिड काळोख सर्वकाळ राखून
ठेविला आहे. १४, १५ आदामापासून सातवा पुरुष
हनोख यानें त्यांस उद्देशून संदेश दिला; तो हा कीं पाहा,
सर्वांचा न्यायनिवाडा करावयास, आणि त्यांपैकीं अभक्त
असलेल्या लोकांनीं अभक्तीनें केलेल्या आपल्या सर्व अभ-
क्तीच्या कर्मांवरून आणि ज्या सर्व कठोर गोष्टी अभक्त पापी
जनांनीं त्याच्याविरुद्ध सांगितल्या त्यांवरून, त्या सर्वांस
दोषी ठरवावयास 'प्रभु आपल्या अयुत पवित्र जनांनीं
वेष्टित असा आला.' १६ ते लोक कुरकूर करणारे,
असंतुष्ट व वासनासक्त असे आहेत; त्यांचें तोंड फुशार-
कीच्या गोष्टी बोलतें; व लाभासाठीं तोंडपुजेपणा करणारे
आहेत;

१७ अहो प्रिय बंधूंनो, आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या
प्रेषितांनीं पूर्वीं सांगितलेल्या वचनांची आठवण करा; १८
त्यांनीं तुम्हांस असें सांगितलें कीं, शेवटल्या काळीं

आपल्या अभक्तीच्या वासनांप्रमाणें चालणारीं, अशीं
थट्टेखोर माणसें उत्पन्न होतील. १९ तीं फूट पाडणारीं,
देहबुद्धीचीं, ज्यांस आत्मा नाहीं अशीं आहेत. २०
प्रिय बंधूंनो, तुम्ही आपल्या परमपवित्र विश्वासावर
स्वतःची रचना करून, पवित्र आत्म्यामध्यें प्रार्थना करून,
२१ आपल्या प्रभु येशू ख्रिस्ताच्या दयेची मार्गप्रतीक्षा
करीत सार्वकालिक जीवनासाठीं आपणांस देवाच्या
प्रीतीमध्यें राखा. २२ जे कित्येक संशयांत आहेत
त्यांजवर दया करा; २३ कित्येकांस अग्नींतून ओढून
काढून त्यांचें तारण करा आणि देहानें ‘ डागळलेलीं वस्त्रें ’
देखील द्वेष्य समजून भीतियुक्त वृत्तीनें कित्येकांवर दया
करा.

२४ तुम्हांस पतनापासून राखण्यास आणि आपल्या
ऐश्वर्ययुक्त सान्निध्यांत निर्दोष असे उल्लासयुक्त उभें
करण्यास जो समर्थ आहे, २५ अशा आपल्या उद्धारक
एकाच देवाला, येशू ख्रिस्त आपला प्रभु याच्या द्वारें
गौरव, महत्त्व, पराक्रम व अधिकार हीं युगारंभापूर्वी,
आतां व युगानुयुग आहेत. आमेन.

# योहानाला झालेलें प्रकटीकरण



### प्रस्तावना व नमस्कार

१ येशू ख्रिस्ताचें प्रकटीकरण : हें त्यानें आपल्या
1 दूताला पाठवून निजदास योहान ह्याला कळविलें; जें
लवकर ‘ झालें पाहिजे ’ तें निजदासांना दर्शविण्या-
करितां त्याला हें देवापासून प्राप्त झालें. २ त्यानें देवाचें
वचन व येशू ख्रिस्ताविषयींची साक्ष, म्हणजे जें जें पाहिलें
त्याविषयीं साक्ष दिली. ३ या संदेशाचे शब्द वाचून
दाखविणारा; ते ऐकणारे व त्यांत लिहिलेल्या गोष्टी पाळणारे
हे धन्य; कारण समय जवळ आला आहे.

४ आसियांतील सात मंडळ्यांस योहानाकडून; जो
आहे, होता व येणार त्याजपासून; त्याच्या राजासनासमोर
जे सात आत्मे त्यांजपासून; ५ आणि विश्वासू साक्षी,
मेलेल्यांमधून ‘ प्रथम जन्मलेला ’ व ‘ पृथ्वीवरील राजांचा
अधिपति ’ येशू ख्रिस्त यांजपासून; तुम्हांस कृपा व शांति
हीं असोत. जो आपल्यावर प्रीति करितो, ज्यानें
स्वरुधिरानें तुम्हांआम्हांला आपल्या पातकांपासून मुक्त
केलें, ६ आणि आपल्याला राज्य, आपल्या ‘ देवपित्या-
साठीं याजक ’ असें केलें; त्याला गौरव व पराक्रम हे
युगानुयुग आहेत. आमेन. ७ ‘ पाहा, तो मेघांसहित येतो;’
प्रत्येक डोळा त्याला ‘ पाहील, ’ ज्यांनीं त्याला
‘ भोसकिलें ’ तेहि पाहतील; आणि पृथ्वीवरील सर्व वंश
त्याजमुळें ऊर बडवून घेतील. ’ असेंच होणार. आमेन.
८ ‘ प्रभु देव ’ ‘ जो आहे, ’ होता व येणार, ‘ जो
सर्वसत्ताधारी, ’ तो म्हणतो मी अल्फा व ओमेगा आहें.[१]

### मनुष्याच्या पुत्राचा साक्षात्कार

९ मी योहान, तुमचा बंधु आणि येशूमध्यें जें संकट,
राज्य व धीर त्यांचा भागीदार, देवाचें वचन व येशू-
विषयींची साक्ष यांमुळें पात्म नांवाच्या बेटांत होतों. १०
प्रभूच्या दिवशीं मी आत्म्यानें संचरित झालों, तेव्हां
मीं आपल्या मागें करण्याच्या वाणीसारखी मोठी वाणी
ऐकली. ११ ती म्हणाली, जें तूं पाहतोस तें पुस्तकांत
लिही, आणि तें इफिस, स्मुर्णा, पर्गम, थुवतीरा, सार्दीस,
फिलदेलफिया व लावदिकीया एथील सात मंडळ्यांकडे
पाठीव. १२ मजबरोबर बोलत असलेली वाणी कोणाची
हें पाहण्यास मी मागें वळलों. मागें वळून पाहतों तों
सोन्याच्या सात समया, १३ आणि त्या समयांच्या मध्य
भागीं ‘ मनुष्याच्या पुत्रासारिखा, पायघोळ वस्त्र परिधान
केलेला, ’ आणि उरावरून ‘ सोन्याचा ’ ‘ पट्टा बांधलेला, ’
असा कोणीएक पुरुष माझ्या दृष्टीस पडला; १४ त्याचे

[१] म्हणजे मी आदिअंत आहें.

'डोकें' व 'केस हीं पांढऱ्या लोकरीसारखीं, बर्फा-
सारखीं' पांढरीं होतीं; 'त्याचे डोळे अग्नीच्या ज्वाले-
सारखे' होते; १५ 'त्याचे पाय' जणू काय भट्टींत
असलेल्या जळजळीत 'सोनपितळेसारखे होते आणि
त्याची वाणी मोठमोठ्या जलप्रवाहांच्या ध्वनीसारखी
होती.' १६ त्याच्या उजव्या हातांत सात तारे होते;
त्याच्या मुखांत पुढें आलेली तीक्ष्ण दुधारी तरवार होती,
आणि त्याचें स्वरूप 'परमतेजानें' प्रकाशणाऱ्या
'सूर्या' सारखें होतें. १७ मीं त्याला पाहिलें तेव्हां
मेल्यासारखा त्याच्या पायांशीं पडलों. मग त्यानें आपला
उजवा हात मजवर ठेवून मला म्हटलें, 'भिऊं नको; जो
पहिला व शेवटला,' आणि सदाजीवी 'तो मी आहें;'
१८ मी मेलों होतों तरी पाहा, युगानुयुग जीवंत आहें,
आणि मरणाच्या व अधोलोकच्या किल्ल्या मजजवळ
आहेत. १९ यास्तव जें तूं पाहिलें, जें आहे व 'यानंतर
जें होणार' तें लिहून ठेव; २० जे सात तारे तूं माझ्या
उजव्या हातांत पाहिले, आणि सोन्याच्या त्या सात समया,
त्यांचें 'गूज' लिहून ठेव. ते सात तारे हे सात
मंडळ्यांचे देवदूत आहेत; आणि त्या सात समया या सात
मंडळ्या आहेत.

## इफिस येथील ख्रिस्ती मंडळीला पत्र

१ इफिस एथील मंडळीच्या देवदूताला लिही:
२ जो आपल्या उजव्या हातांत सात तारे धरितो, जो
सोन्याच्या सात समयांमधून चालतो, तो असें
म्हणतो: २ तुझीं कृत्यें, तुझे श्रम व तुझा धीर हीं मला
ठाऊक आहेत; तुला दुष्ट लोक सहन होत नाहींत, जे
प्रेषित नसतां आपण प्रेषित आहों असें म्हणतात त्यांची
परीक्षा तूं घेतली, आणि ते लबाड आहेत असें तुला
दिसून आलें. ३ तुझ्या अंगीं धीर आहे, माझ्या नामामुळें
तूं दुःख सोशिलें आहे आणि तूं थकला नाहींस हेंहि मला
ठाऊक आहे. ४ तरी तूं आपली पहिली प्रीति सोडिली
याविषयीं मला तुला दोष देणें आहे. ५ तूं कोठून पडला
आहेस त्याची आठवण कर व पश्चात्ताप करून आपलीं
पहिलीं कृत्यें कर; नाहीं तर मी तुजकडे येईन, आणि तूं
पश्चात्ताप न केला तर तुझी समई तिच्या ठिकाणावरून
काढीन. ६ तरी पण तुझ्यांत विशेष हें आहे कीं निकला-
इतांच्या कृत्यांचा द्वेष तूं करितोस; त्यांचा मीहि द्वेष
करितों. ७ आत्मा मंडळ्यांस काय म्हणतो हें ज्याला कान
आहे तो ऐको. जो विजय मिळवितो त्याला, 'देवाच्या
बागेंत जें जीवनाचें झाड' आहे, 'त्यावरचें' फळ मी
खावयास देईन.

## स्मुर्णा येथील ख्रिस्ती मंडळीला पत्र

८ स्मुर्णा एथील मंडळीच्या देवदूताला लिही:
जो पहिला व शेवटला, जो मेला होता व जीवंत झाला,
तो असें म्हणतो: ९ तुझें संकट व तुझें दारिद्र्य मला ठाऊक
आहे (तरी तूं धनवान् आहेस); आणि जे यहूदी नसून
स्वतःला यहूदी म्हणवितात व केवळ सैतानाची धर्मसभा
आहेत, अशा लोकांचें निंदायुक्त भाषणहि मला ठाऊक
आहे. १० तुला सोसावयाचीं जीं संकटें आहेत त्यांचें
भय धरूं नको; पाहा, तुम्हीं 'मोहांत पडावें' म्हणून
सैतान तुम्हांपैकीं कित्येकांस तुरुंगांत टाकणार आहे; आणि
तुम्ही 'दहा दिवस' संकटांत असाल. तुला मरावें लागलें
तरी विश्वासू राहा, म्हणजे मी तुला जीवनी मुगूट देईन.
११ आत्मा मंडळ्यांस काय म्हणतो, हें ज्याला कान आहे
तो ऐको; जो विजय मिळवितो त्याला दुसऱ्या मरणाची
बाधा होणार नाहीं.

## पर्गम येथील ख्रिस्ती मंडळीला पत्र

१२ पर्गम एथील मंडळीच्या देवदूताला लिही:
ज्याच्याजवळ तीक्ष्ण दुधारी तरवार आहे तो असें
म्हणतो: १३ तूं कोठें राहतोस हें मला ठाऊक आहे,
सैतानाचें आसन आहे तेथें राहतोस; तूं माझें नाम दृढ
धरून राहिला आहेस, आणि माझा साक्षी, माझा विश्वासू
अंतिपा, तुम्हांमध्यें म्हणजे सैतान राहतो तेथें जिवें
मारिला गेला, त्याच्या दिवसांतहि तूं मजवरील विश्वास
नाकारिला नाहीं. १४ तथापि मला तुला थोड्या गोष्टीं-
विषयीं दोष देणें आहे; त्या ह्या कीं तेथें तुझ्याजवळ
बलामाचें शिक्षण खरें मानून राहणारे लोक आहेत; त्यानें
बालाकाला इस्राएलाच्या संतानापुढें, मूर्तीला अर्पिलेलें खाणें
व जारकर्म करणें, हें अडखळण ठेवण्यास शिकविलें. १५
त्याप्रमाणें तुझ्याजवळ निकलाइतांचें तशाच प्रकारचें शिक्षण

खरें मानून राहणारेहि लोक आहेत. १६ यास्तव पश्चात्ताप
कर, नाहीं तर मी तुजकडे लवकरच येऊन आपल्या
तोंडांतल्या तरवारीनें त्यांजबरोबर लढेन. १७ आत्मा
मंडळ्यांस काय म्हणतो हें ज्याला कान आहे तो ऐको.
जो विजय मिळवितो त्याला गुप्त ‘ ठेविलेल्या मान्न्यांतून
मी देईन ’ आणि त्याला मी पांढरा खडा देईन; त्या
खड्यावर ‘ नवें नांव ’ लिहिलें आहे, तें तो खडा
घेणाऱ्याशिवाय कोणाला ठाऊक नाहीं.

## थुवतीरा येथील ख्रिस्ती मंडळीला पत्र

१८ थुवतीरा एथील मंडळीच्या देवदूताला लिही :
ज्याचे ‘ डोळे अग्नीच्या ज्वालेसारखे ’ आहेत आणि
ज्याचे ‘ पाय सोनपितळेसारिखे आहेत, असा देवाचा
पुत्र म्हणतो : १९ तुझीं कृत्यें, प्रीति, विश्वास, सेवा व
तुझा धीर हीं मला ठाऊक आहेत; आणि तुझीं शेवटचीं
कृत्यें पहिल्या कृत्यांपेक्षां अधिक आहेत, हेंहि मला
ठाऊक आहे. २० तरी, मला तुजला दोष देणें आहे, तो
असा कीं जी ईजबेल नामें स्त्री आपणाला संदेष्टी म्हणविते,
आणि ‘ जारकर्म करण्यास व मूर्तीला अर्पिलेलें खाण्यास ’
माझ्या दासांस शिकवून भुलविते, तिला तूं तसें करूं
देतोस. २१ तिनें पश्चात्ताप करावा, म्हणून मीं तिला
अवकाश दिला, तरी आपल्या जारकर्माविषयीं पश्चात्ताप
करण्याची तिला इच्छा नाहीं. २२ पाहा, मी तिला
अंथरुणाला खिळलेली अशी करीन, आणि तिजबरोबर
जारकर्म करणाऱ्या लोकांस, तिच्या कृत्यांविषयीं त्यांनीं
पश्चात्ताप न केल्यास, मोठ्या संकटांत पाडीन. २३ मी
तिच्या मुलांबाळांस मरीनें जीवें मारीन, म्हणजे सर्व मंड-
ळ्यांना कळून येईल कीं ‘ मनें व अंतःकरणें यांची पारख
करणारा ’ मी आहें; आणि तुम्हां ‘ प्रत्येकाला तुमच्या
कृत्यांप्रमाणें ’ देईन. २४ थुवतीरा एथील बाकीचे जे तुम्ही
त्या शिक्षणाप्रमाणें चालणारे नाहीं, ज्यांस सैतानाच्या खोल
म्हणविलेल्या गोष्टी माहीत नाहींत त्या तुम्हांस मी सांगतों
कीं मी तुम्हांवर दुसरा भार घालणार नाहीं; २५ इतकेंच
करावें कीं जें तुमचें आहे तें मी येईपर्यंत दृढ धरून राहा.
२६ जो विजय मिळवितो व शेवटपर्यंत माझीं कृत्यें करीत
राहतो ‘ त्यास, ’ जसा मलाहि पित्यापासून मिळाला तसा
अधिकार मी ‘ राष्ट्रांवर ’ ‘ देईन; ’ २७ ‘ आणि जसा मातीच्या
भांड्यांचा चुराडा करितात तसा तो लोहदंडानें त्यांजवर
अधिकार करील; ’ २८ मी त्याला प्रभाततारा देईन. २९
आत्मा मंडळ्यांस काय म्हणतो हें ज्याला कान आहे तो ऐको.

## सार्दीस येथील ख्रिस्ती मंडळीला पत्र

३ १ सार्दीस एथील मंडळीच्या देवदूताला लिही :
ज्याच्याजवळ देवाचे सात आत्मे आहेत व सात तारे
आहेत तो असें म्हणतो : तुझीं कृत्यें मला ठाऊक आहेत;
तूं जीवंत आहेस असें तुला नांव आहे, तरी तूं मेलेला आहेस हें
मला ठाऊक आहे. २ तूं जागृत हो, आणि जें मृतवत्
होऊन राहिलें आहे तें स्थिर कर; कारण तुझीं कृत्यें माझ्या
देवाच्या दृष्टीनें पूर्ण अशीं माझ्या दिसण्यांत आलीं नाहींत.
३ यास्तव तूं कसें घेतलें व ऐकलें याची आठवण कर; तें
राखून ठेव व पश्चात्ताप कर; कारण तूं जागृत न झालास
तर मी चोरासारखा येईन; मी कोणत्या घटकेस तुजवर
येईन हें तुला कळणार नाहीं. ४ तरी ज्यांनीं आपलीं वस्त्रें
विटाळविलीं नाहींत, अशीं थोडकीं नांवें सार्दीस एथें तुझ्या-
जवळ आहेत; ते शुभ्र वस्त्रें परिधान करून माझ्याबरोबर
फिरतील, कारण ते लायक आहेत. ५ जो विजय मिळ-
वितो तो अशा रीतीनें शुभ्र वस्त्रें परिधान केलेला होईल;
मी ‘ जीवनी पुस्तकांतलें ’ त्याचें नांव ‘ खोडणार ’ नाहीं,
आणि माझ्या पित्यासमोर व त्याच्या दूतांसमोर मी त्याचें
नांव पत्करून घेईन. ६ आत्मा मंडळ्यांस काय म्हणतो हें
ज्याला कान आहे तो ऐको.

## फिलदेलफिया येथील ख्रिस्ती मंडळीला पत्र

७ फिलदेलफिया एथील मंडळीच्या देवदूताला लिही :
जो पवित्र व सत्य असून ज्याच्याजवळ ‘ दाविदाची किल्ली
आहे, जो उघडतो आणि कोणी बंद करणार नाहीं, आणि जो
बंद करतो आणि कोणी उघडीत नाहीं, ’ तो असें म्हणतो : ८
तुझीं कृत्यें मला ठाऊक आहेत ( पाहा, मीं तुजपुढें दार उघडून
दिलें आहे, तें कोणाच्यानें बंद करवत नाहीं ); तुला शक्ति
थोडी आहे, तरी तूं माझें वचन पाळिलें व माझें नाम
नाकारिलें नाहीं, हें मला ठाऊक आहे. ९ पाहा, जे सैता-
नाच्या धर्मसभेचे असून आपणांला यहूदी म्हणवितात, पण
तसे नाहींत; ते खोटें बोलतात; त्यांपैकीं कांहीं तुला देईन;

पाहा, ते ‘ येऊन तुझ्या पायांजवळ नमन करितील ’ व
‘ मीं तुजवर प्रीति केली आहे ’ हें समजून घेतील; असें
मी करीन. १० तूं माझें धीराचें वचन राखिलें आहे म्हणून
पृथ्वीवर राहणाऱ्या लोकांची परीक्षा होण्याचा जो सर्व
जगावर परीक्षाप्रसंग येणार आहे त्या परीक्षाप्रसंगापासून
मीहि तुला राखीन. ११ मी लवकर येतों; कोणीं तुझा
मुगूट घेऊं नये म्हणून जें तुझें आहे तें दृढ धरून राहा.
१२ जो विजय मिळवितो त्याला मी आपल्या देवाच्या
मंदिरांतील स्तंभ करीन; तो तेथून कधीं बाहेर जाणारच
नाहीं; त्यावर माझ्या देवाचें नाम, स्वर्गांतून माझ्या देवा-
पासून उतरणारें नवें यरुशलेम, माझ्या देवाचें ‘ नगर,
याचें नाम; ’ आणि माझें ‘ नवें नाम ’ लिहीन. १३ आत्मा
मंडळ्यांस काय म्हणतो हें ज्याला कान आहे तो ऐको.

## लावदिकीया येथील ख्रिस्ती मंडळीला पत्र

१४ लावदिकीया एथील मंडळीच्या देवदूताला लिही :
जो आमेन, जो ‘ विश्वासू ’ व खरा ‘ साक्षी, ’ जो
देवाच्या ‘ सृष्टीचें आदिकारण ’ तो असें म्हणतो, १५
तुझीं कृत्यें मला ठाऊक आहेत; तूं शीत नाहींस व उष्ण
नाहींस हें मला ठाऊक आहे; तूं शीत किंवा उष्ण
असतास तर बरें होतें; १६ पण तूं तसा नाहींस,
कोंबट आहेस; म्हणजे उष्ण नाहींस, शीत नाहींस,
म्हणून मी तुला आपल्या तोंडांतून ओकून टाकणार
आहें. १७ मी धनवान् आहें, मीं ‘ धन मिळविलें
आहे, ’ व मला कांहीं उणें नाहीं असें तूं म्हणतोस;
पण तूं कष्टी, दीन, दरिद्री, अंधळा व उघडावाघडा
आहेस, हें तुला कळत नाहीं. १८ ह्याकरितां मी
तुला मसलत देतों कीं धनवान् व्हावें म्हणून तूं
अग्नीनें शुद्ध केलेलें सोनें मजपासून विकत घे; तुझी
लज्जास्पद नग्नता दिसण्यांत येऊं नये म्हणून नेसावयास
शुभ्र वस्त्रें विकत घे; आणि तुझी दृष्टि यावी म्हणून
डोळ्यांत घालण्यास अंजन विकत घे. १९ ‘ जितक्यां-
वर मी प्रीति करितों तितक्यांला त्यांचे अपराध
त्यांच्या पदरीं घालून शिक्षा करितों; ’ यास्तव आस्था
धर आणि पश्चात्ताप कर. २० पाहा, मी दाराजवळ
उभा आहें व ठोकीत आहें; जर कोणी माझी वाणी
ऐकून दार उघडील, तर मी त्याच्याजवळ आंत
जाईन व त्याजबरोबर जेवीन, आणि तो मजबरोबर
जेवील. २१ जो विजय मिळवितो त्याला मी आपल्या
राजासनावर आपल्याजवळ बसूं देईन; मीहि तसा
विजय मिळवून आपल्या पित्याजवळ त्याच्या राजास-
नावर बसलों; २२ आत्मा मंडळ्यांस काय म्हणतो
हें ज्याला कान आहे तो ऐको.

## स्वर्गाचा साक्षात्कार

१ यानंतर मीं पाहिलें, तों पाहा, स्वर्गांत एक
४ दार उघडलेलें आणि जी वाणी मीं प्रथम ऐकली
ती मजबरोबर ‘ बोलणाऱ्या कर्ण्या’सारखी होती;
ती म्हणाली, इकडे ‘ वर ये, ’ म्हणजे जें यानंतर
‘ झालें पाहिजे ’ तें तुला दाखवीन. २ इतक्यांत मी
आत्म्यानें संचरित झालों, तों पाहा, स्वर्गांत राजासन
मांडलेलें आहे, आणि त्या राजासनावर कोणी बसलेला
आहे. ३ जो बसलेला तो दिसण्यांत यास्फे व सार्दि या रत्नां-
सारिखा आहे; राजासनाभोंवतीं दिसण्यांत पाचेसारिखें ‘मेघ-
धनुष्य आहे; ’ ४ राजासनाभोंवतीं चोवीस आसनें आहेत;
आणि त्या आसनांवर शुभ्र वस्त्रें परिधान केलेले व
डोक्यांवर सोन्याचे मुगूट घातलेले ते चोवीस वडील
बसलेले आहेत; असें दृष्टीस पडलें. ५ राजासनाच्या
आंतून ‘ विजा, वाणी व गर्जना निघत आहेत; ’ सात
अग्निरूपी मशाली राजासनापुढें जळत आहेत; त्या
देवाचे सात आत्मे आहेत. ६ राजासनापुढें ‘ स्फटि-
कासारखा ’ जसा काय काचेचा समुद्र आहे; आणि
राजासनाच्या मध्यभागीं व राजासनाच्या चार बाजूंस,
पुढें व मागें ‘ डोळ्यांनीं भरलेले असे चार प्राणी ’
आहेत. ७ ‘ पहिला प्राणी सिंहा’सारखा, दुसरा गोऱ्ह्या-
सारखा, ‘ तिसऱ्याचें तोंड ’ मनुष्याच्या तोंडासारखें व
‘ चौथा प्राणी ’ उडत्या ‘ गरुडा ’ सारिखा आहे. ८ त्या
चारहि प्राण्यांला ‘ प्रत्येकीं सहा सहा पंख असून ते
प्राणी सर्वांगीं, वरून ’ व पंखांखालींहि, ‘ डोळ्यांनीं भरलेले ’
आहेत; आणि,

‘ पवित्र, पवित्र, पवित्र, जो होता, आहे व येतो ’
तो ‘ प्रभु देव, सर्वसत्ताधारी, ’

हें म्हणावयाचें ते रात्रंदिवस थांबत नाहींत.
९ ‘राजासनावर बसलेला जो युगानुयुग जीवंत’ याचें
जेव्हां जेव्हां ते प्राणी गौरव, सन्मान व उपकारस्मरण
करितात, १० तेव्हां तेव्हां ते चोवीस वडील ‘राजास-
नावर जो बसलेला’ त्याच्या पायां पडतात; जो ‘युगानु-
युग जीवंत’ त्याला नमस्कार घालतात; आणि आपले
मुगूट राजासनापुढें ठेवून म्हणतात;
११ हे प्रभो, आमच्या देवा, गौरव, सन्मान व
सामर्थ्य हीं तुम्हीं आहेत, असें म्हणवून
घ्यावयास तूं योग्य आहेस; कारण तूं सर्व
कांहीं उत्पन्न केलें; तुझ्या इच्छेनें तें झालें व
अस्तित्वांत आलें.

## देवाच्या कोकऱ्याचा साक्षात्कार

५ १ जो राजासनावर बसलेला होता त्याच्या
उजव्या हातावर पाठपोट लिहिलेली व सात शिक्के
मारून बंद केलेली अशी पुस्तकाची एक गुंडाळी मीं
पाहिली; २ आणि पुस्तकाचे शिक्के फोडून तें उघडावयास
कोण योग्य आहे, असें मोठ्यानें ओरडणारा एक बलवान्
देवदूत मीं पाहिला. ३ तेव्हां स्वर्गांत, पृथ्वीवर किंवा
पृथ्वीखालीं कोणी हें पुस्तक उघडावयास किंवा त्यांत
पाहावयास समर्थ नव्हता. ४ हें पुस्तक उघडावयास किंवा
त्यांत पहावयास योग्य असा कोणी आढळला नाहीं म्हणून
मी फार रडलों. ५ तेव्हां वडीलमंडळापैकीं एक जण मला
म्हणाला, रडूं नको; पाहा, ‘यहूदा’ वंशाचा ‘सिंह,’
दाविदाचा ‘अंकुर’ यानें जय मिळविला; तो त्याचे सात
शिक्के फोडून पुस्तक उघडण्यास योग्य आहे. ६ तेव्हां
राजासन व चार प्राणी हीं, आणि वडीलमंडळ ह्यांच्या-
मध्यें, ज्याचा जणूं काय वध करण्यांत आला होता,
असा ‘कोकरा’ उभा राहिलेला मीं पाहिला; त्याला
सात शिंगें व ‘सात डोळे होते;’ ते ‘सर्व पृथ्वीवर’
पाठविलेले देवाचे सात आत्मे आहेत. ७ त्यानें जाऊन
‘राजासनावर जो बसलेला’ होता त्याच्या उजव्या
हातांतून तें पुस्तक घेतलें. ८ त्यानें पुस्तक घेतलें तेव्हां
ते चार प्राणी व चोवीस वडील कोकऱ्याच्या पायां
पडले; त्या सगळ्या वडीलमंडळाजवळ वीणा व धुपानें
भरलेलीं सोन्याचीं धुपाटणीं होतीं; तीं पवित्र जनांच्या
प्रार्थना आहेत. ९ ते ‘नवें गीत गातात,’ तें असें;
तूं पुस्तक घ्यावयास व त्याचे शिक्के फोडावयास
योग्य आहेस; कारण तूं वधिला गेला
होतास; आणि तूं आपल्या रक्तानें सर्व वंश,
भाषा, लोक व राष्ट्रें यांतले इसम आमच्या
देवासाठीं विकत घेतले आहेत. १० आमच्या
देवासाठीं त्यांस राज्य व याजक असे केले
आहेत; आणि ते पृथ्वीवर राज्य करीत आहेत.
११ तेव्हां मीं पाहिलें तों राजासन, प्राणी व वडील
यांच्याभोंवतीं बहुत देवदूतांची वाणी ऐकूं आली; आणि
त्यांची संख्या ‘अयुतांचीं अयुतें व सहस्रांचीं सहस्रें होतीं.’
१२ ते मोठ्यानें म्हणत होते:
वधलेला कोकरा सामर्थ्य, धन, ज्ञान, बल,
सन्मान, गौरव व स्तुति ह्यांचा स्वीकार
करण्यास योग्य आहे.
१३ स्वर्गांत, पृथ्वीवर, पृथ्वीच्या खालीं व समुद्रावर जी
प्रत्येक वस्तु आहे ती, आणि त्यांतील सर्व यांस मीं असें
म्हणतांना ऐकलें:
‘राजासनावर बसलेला’ याला व कोकऱ्याला
स्तुति, सन्मान, गौरव व सत्ता हीं युगानुयुग
असोत.
१४ तेव्हां ते चार प्राणी म्हणाले, आमेन; आणि वडील
मंडळींनीं पायां पडून नमस्कार केला.

## शिक्के फोडण्यांत आले

६ १ मग कोकऱ्यानें सात शिक्क्यांपैकीं एक शिक्का
फोडिला, तेव्हां मीं पाहिलें; तों चार प्राण्यांतील
एकाला गर्जनेसारख्या वाणीनें, ये, असें म्हणतांना मीं
ऐकलें. २ मग मीं पाहिलें तों ‘पांढरा घोडा,’ आणि
त्याजवर बसलेला एक स्वार दृष्टीस पडला; त्याच्याजवळ
धनुष्य होतें व त्याला मुगूट देण्यांत आला; तो जिंकीत व
जिंकावयाला निघाला.

३ त्यानें दुसरा शिक्का फोडिला, तेव्हां मीं दुसऱ्या
प्राण्याला, ये, असें म्हणतांना ऐकलें. ४ तेव्हां दुसरा घोडा
पुढें चालला; तो अग्निवर्ण होता आणि त्यावर बसलेल्या

पुरुषाकडे पृथ्वीची शांति हरण करण्याचें आणि लोकांकडून
एकमेकांचा वध करविण्याचें काम सोपविलें होतें; त्याला
मोठी तरवार दिलेली होती.
५ त्यानें तिसरा शिक्का फोडिला, तेव्हां मीं तिसऱ्या
प्राण्याला, ये, असें म्हणतांना ऐकलें; मग मीं पाहिलें
तों 'काळा घोडा,' आणि त्यावर बसलेला एक पुरुष
दृष्टीस पडला; त्याच्या हातांत तागडी होती; ६ आणि चार
प्राण्यांच्या मधून निघालेल्या वाणीसारखी वाणी मीं ऐकली,
ती अशी : पावल्याला शेरभर गहूं, आणि पावल्याला तीन
शेर जव; तेल व द्राक्षारस यांची हानि करूं नको.
७ त्यानें चवथा शिक्का फोडिला, तेव्हां मीं चवथ्या
प्राण्याला, ये, असें म्हणतांना ऐकलें. ८ मग मीं पाहिलें,
तों फिक्का घोडा; आणि त्यावर बसलेला एक पुरुष दृष्टीस
पडला, त्याचें नांव 'मृत्यु;' त्याच्यामागून अधोलोक
चालला होता. त्यांना 'तरवारीनें, दुष्काळानें, मरणानें व
पृथ्वीवरील श्वापदांकडून माणसांना मारण्याचा' अधिकार
पृथ्वीच्या चवथ्या भागावर दिला होता.
९ त्यानें पांचवा शिक्का फोडिला, तेव्हां मीं वेदीखालीं
आत्मे पाहिले; ते आत्मे देवाच्या वचनामुळें व त्यांनीं जी
साक्ष पटविली होती तिजमुळें जिवें मारिलेल्या लोकांचे होते.
१० ते मोठ्यानें ओरडून म्हणाले, 'हे प्रभो,' जो तूं पवित्र व
सत्य आहेस तो तूं 'न्यायनिवाडा करीत' नाहींस आणि
'पृथ्वीवर राहणाऱ्या जणांपासून' आमच्या 'रक्ताचा सूड
घेत' नाहींस; हें किती वेळ चालणार? ११ तेव्हां त्या
प्रत्येकास एकएक शुभ्र झगा देण्यांत आला आणि त्यांस
असें सांगण्यांत आलें कीं तुमचे सोबतीचे दास व तुमचे
बंधु तुम्हांसारिखे जिवें मारिले जाणार, त्यांची संख्या पूर्ण
होईपर्यंत तुम्ही आणखी थोडा वेळ स्वस्थ राहा.
१२ त्यानें सहावा शिक्का फोडिला; तेव्हां मीं पाहिलें,
तों मोठा भूमिकंप झाला; 'सूर्य' केसांच्या तरटासारिखा
काळा झाला व सगळा 'चंद्र रक्ता' सारिखा झाला; १३
'अंजिराचें झाड' मोठ्या वाऱ्यानें हाललें म्हणजे त्याचीं
कच्चीं फळें जशीं खालीं पडतात तसे 'आकाशांतील तारे'
पृथ्वीवर 'पडले.' १४ 'एकादें पुस्तक गुंडाळावें' तसें
आकाश गुंडाळलें जाऊन निघून गेलें, आणि सर्व डोंगर व
बेटें आपापल्या ठिकाणांवरून सरून गेलीं. १५ 'पृथ्वीवरील
राजे व मोठे अधिकारी,' सरदार, श्रीमंत व बळवान् लोक,
सर्व दास व सर्व स्वतंत्र माणसें, 'गुहांत' व डोंगरांतील
'खडकांत लपलीं;' १६ 'आणि ते डोंगरांस व खडकांस
म्हणाले, आम्हांवर पडून राजासनावर बसलेल्या' पुरुषाच्या
तोंडापुढून व कोकऱ्याच्या क्रोधापासून आम्हांस 'लपवा;'
१७ कारण त्यांच्या 'क्रोधाचा मोठा दिवस' आला आहे,
'आणि त्यापुढें कोण टिकेल?'

## एकशें चवेचाळीस हजारांवर शिक्का

७ १ त्यानंतर मीं चार देवदूत 'पृथ्वीच्या चार कोनां-
वर' उभे राहिलेले पाहिले; ते पृथ्वीवरून व समुद्रावरून
वारा वाहूं नये व कोणत्याहि झाडाला लागूं नये
म्हणून पृथ्वीच्या 'चार वाऱ्यांस' धरून ठेवीत होते.
२ मीं दुसरा एक देवदूत सूर्याच्या उगवतीपासून वर
चढतांना पाहिला, त्याच्याजवळ सदाजीवी देवाचा शिक्का
होता; ज्या चार देवदूतांकडे पृथ्वीला व समुद्राला उपद्रव
करण्याचें सोपविलें होतें त्यांस तो मोठ्या वाणीनें
म्हणाला : ३ आमच्या देवाचे जे दास आहेत त्यांच्या
'कपाळांवर' आम्ही 'शिक्का मारीपर्यंत' पृथ्वीला,
समुद्राला व झाडांना उपद्रव करूं नका. ४ ज्यांच्यावर
शिक्का करण्यांत आला त्यांची संख्या मीं ऐकली; इस्राएल
लोकांच्या सर्व वंशांपैकीं एकशें चवेचाळीस हजारांवर
शिक्का मारण्यांत आला,

५ यहूदा वंशापैकीं बारा हजारांवर शिक्का
मारण्यांत आला;
रऊबेन वंशापैकीं बारा हजारांवर;
गाद वंशापैकीं बारा हजारांवर;
६ आशेर वंशापैकीं बारा हजारांवर;
नफताली वंशापैकीं बारा हजारांवर;
मनश्शे वंशापैकीं बारा हजारांवर;
७ शिमोन वंशापैकीं बारा हजारांवर;
लेवी वंशापैकीं बारा हजारांवर;
इस्साखार वंशापैकीं बारा हजारांवर;
८ जबुलून वंशापैकीं बारा हजारांवर;
योसेफ वंशापैकीं बारा हजारांवर;

बन्यामीन वंशापैकीं बारा हजारांवर शिक्का झाला.

## स्वर्गातील उद्धार पावलेल्यांचा साक्षात्कार

९ त्यानंतर मीं पाहिलें तों सर्व राष्ट्रें, वंश, लोक
व भाषा यांपैकीं कोणाच्यानें मोजवला नाहीं असा,
शुभ्र झगे परिधान केलेला व हातीं झावळ्या असलेला,
मोठा लोकसमुदाय राजासनासमोर व कोकऱ्यासमोर
उभा राहिलेला माझ्या दृष्टीस पडला. १० ते उच्च
वाणीनें म्हणत होते :

'राजासनावर बसलेल्या' आमच्या देवाचा व
कोकऱ्याचा तारणाबद्दल महिमा होवो.

११ तेव्हां राजासन, वडीलमंडळ व चार प्राणी यांच्या
भोवते सर्व देवदूत उभे होते, ते राजासनासमोर उपडे
पडून देवाला नमस्कार घालून म्हणाले :
१२ आमेन; धन्यवाद, गौरव, ज्ञान, उपकार-
स्मरण, सन्मान, सामर्थ्य व बळ हीं युगानुयुग
आमच्या देवाचीं आहेत; आमेन.
१३ तेव्हां वडीलमंडळापैकीं एकानें मला म्हटलें, शुभ्र
झगे परिधान केलेले हे कोण आहेत व कोठून आले ?
१४ मीं त्याला म्हटलें, प्रभो, हें तुला ठाऊक आहे.
तो मला म्हणाला, मोठ्या संकटांतून येतात ते हे
आहेत; ह्यांनीं 'आपले झगे' कोकऱ्याच्या 'रक्तांत
धुऊन' शुभ्र केले आहेत. १५ यामुळें ते देवाच्या
राजासनासमोर आहेत; ते अहोरात्र त्याच्या मंदिरांत
त्याची सेवा करितात; आणि 'राजासनावर बसलेला'
त्यांजवर आपला मंडप करील. १६ ते यापुढें 'भुकेले
असे होणार नाहींत; व तान्हेलेहि होणार नाहींत;'
त्यांस सूर्य किंवा कोणतीहि 'उष्णता बाधणार नाहीं;'
१७ कारण राजासनापुढें मध्यभागीं असलेला कोकरा
त्यांचा 'मेंढपाळ' होईल व जीवनी पाण्याच्या झऱ्यां-
जवळ त्यांस नेईल; आणि देव त्यांच्या 'डोळ्यांचे सर्व
अश्रु पुसून टाकील.'

## सात कर्ण्यांचा नाद होणें

१ त्यानें सातवा शिक्का फोडिल्यावर स्वर्गांत
८ सुमारें अर्धा तासपर्यंत निवांत झालें. २ तेव्हां
देवासमोर उभे राहणारे सात देवदूत मीं पाहिले;
त्यांस सात कर्णे दिले होते.
३ मग दुसरा एक देवदूत येऊन 'वेदीपुढें उभा
राहिला,' त्याच्याजवळ सोन्याचें धुपाटणें होतें; आणि
सर्व पवित्र जनांच्या 'प्रार्थनांसह' राजासनासमोरच्या
सोन्याच्या वेदीवर 'धूप' ठेवण्याकरितां त्याजवळ तो
'धूप' पुष्कळ दिला होता. ४ देवदूताच्या हातांतून
धुपाचा धूर पवित्र जनांच्या 'प्रार्थनांसह' देवासमोर
वर चढला. ५ तेव्हां देवदूतानें धुपाटणें घेऊन त्यांत
'वेदीवरचा अग्नि भरून' पृथ्वीवर टाकिला, तों 'गर्जना,
वाणी, विजा' व भूमिकंप हीं झालीं.
६ मग ज्या सात देवदूतांजवळ सात कर्णे होते ते
वाजविण्यास ते सिद्ध झाले.
७ पहिल्या देवदूतानें कर्णा वाजविला तों रक्तमिश्रित
'गारा व अग्नि उत्पन्न होऊन त्यांची पृथ्वीवर' वृष्टि
झाली; तेव्हां पृथ्वीचा तृतीयांश जळून गेला, झाडांचा
तृतीयांश जळून गेला व सर्व हिरवें गवत जळून गेलें.
८ दुसऱ्या देवदूतानें कर्णा वाजविला, तों 'अग्नीनें
पेटलेल्या' मोठ्या 'डोंगरासारिखें' समुद्रांत कांहीं
टाकिलें गेलें; समुद्राच्या तृतीयांशाचें 'रक्त झालें;'
९ आणि समुद्रांतल्या उत्पत्तींतील तृतीयांश प्राणी मरण
पावले; तसेंच तृतीयांश तारवांचा नाश झाला.
१० तिसऱ्या देवदूतानें कर्णा वाजविला तों मशाली-
सारखा पेटलेला मोठा 'तारा आकाशांतून खालीं पडला.'
तो नद्यांच्या तृतीयांशावर व पाण्याच्या झऱ्यावर
पडला; ११ त्या ताऱ्याचें नांव कडूदवणा; आणि
पाण्याच्या तृतीयांशाचा कडूदवणा झाला; आणि त्या
पाण्यानें मनुष्यांपैकीं पुष्कळ मेलीं, कारण तें कडू झालें
होतें.
१२ चवथ्या देवदूतानें कर्णा वाजविला, तों सूर्याचा
तृतीयांश, चंद्राचा तृतीयांश व ताऱ्यांचा तृतीयांश यांवर
प्रहार झाला; त्यांचा तृतीयांश अंधकारमय व्हावा आणि
दिवसाच्या तसें रात्रीच्याहि तृतीयांशात प्रकाश पडूं नये
म्हणून असें झालें.
१३ मीं पाहिलें तों एक गरुड अंतराळाच्या मध्यभागीं
उडतांना दृष्टीस पडला; त्यास मोठ्यानें असें म्हणतांना मीं

ऐकलें: जे तीन देवदूत करणा वाजविणार आहेत त्यांच्या करण्यांच्या होणाऱ्या ध्वनीनें पृथ्वीवर राहणाऱ्या जनांवर अनर्थ, अनर्थ, अनर्थ येणार !

९ १ पांचव्या देवदूतानें करणा वाजविला, तों एक तारा आकाशांतून पृथ्वीवर पडलेला माझ्या दृष्टीस पडला; त्याच्याजवळ अगाधकूपाची किल्ली दिली होती. २ त्यानें अगाधकूप उघडिला, तों त्यांतून मोठ्या 'भट्टीच्या धुरासारिखा धूर बाहेर येऊन वर चढला;' आणि कूपाच्या धुरानें 'सूर्य' व अंतराळ हीं 'अंधकारमय' झालीं. ३ त्या धुरांतून टोळ निघून पृथ्वीवर उतरले; त्यांस पृथ्वीवरील विंचवांसारखी शक्ति दिली होती. ४ त्यांस असें सांगितलें होतें कीं, 'पृथ्वीवरील गवताला, कोणत्याहि हिरवळीला व कोणत्याहि झाडाला' उपद्रव करूं नये; तर ज्या मनुष्यांच्या 'कपाळांवर' देवाचा 'शिक्का' नाहीं त्यांस मात्र करावा. ५ त्यांस जिवें मारण्याचें त्यांजकडे सोपविलें नव्हतें तर मात्र पांच महिने पीडा देण्याचें सोपविलें होतें; त्यांपासून होणारी पीडा, विंचू मनुष्याला नांगी मारितो तेव्हां होणाऱ्या पीडेसारखी होती. ६ त्या दिवसांत मनुष्यें 'मरणाचा प्रसंग पाहतील तरी तो त्यांस मिळणार नाहीं;' मरावयाची उत्कंठा धरतील, तरी मरण त्यांजपासून दूर पळेल. ७ त्या टोळांचा 'आकार लढाईसाठीं' सज्ज केलेल्या 'घोड्यांच्या आकारासारखा' होता; त्यांच्या डोक्यांवर सोन्यासारिखे दिसणारे मुगूट होते आणि त्यांचे तोंडवळे माणसांच्या तोंडवळ्यांसारिखे होते. ८ त्यांचे केस स्त्रियांच्या केसांसारिखे आणि त्यांचे दांत सिंहांच्या 'दांतांसारिखे' होते. ९ त्यांस उरस्त्राणें होतीं तीं लोखंडी उरस्त्राणांसारिखीं दिसत होतीं; आणि त्यांच्या पंखांचा आवाज 'लढाईत धावणाऱ्या' पुष्कळ घोड्यांच्या 'रथांच्या आवाजासारिखा' होता; १० त्यास विंचवांसारखीं शेपटें व नांग्या आहेत आणि मनुष्यांस पांच महिने उपद्रव करण्याची शक्ति त्यांच्या शेपटांत आहे. ११ अगाधकूपाचा दूत हा त्यांजवर राजा आहे; इब्री भाषेंतलें त्याचें नांव अबद्दोन, आणि हेल्लेणी भाषेंतलें त्याचें नांव अपल्लूओन आहे.

१२ पहिला अनर्थ होऊन गेला; पाहा, यानंतर आणखी दोन अनर्थ येणार आहेत.

१३ नंतर सहाव्या देवदूतानें करणा वाजविला, तों देवासमोरील सुवर्ण वेदीच्या शिंगांमधून झालेली एक वाणी मीं ऐकली; १४ करणा असलेल्या सहाव्या देवदूताला ती म्हणाली, फरात महानदीवर बांधून ठेविलेल्या चार देवदूतांला मोकळे कर. १५ तेव्हां मनुष्यांपैकीं तृतीयांश मनुष्यें जिवें मारण्याकरितां नेमलेली घटिका, दिवस, महिना व वर्ष यांसाठीं तयार केलेले हे चार देवदूत मोकळे झाले. १६ स्वारांच्या सैन्यांची संख्या वीस कोटि होती; ही त्यांची संख्या मीं ऐकली. १७ त्या दृष्टांतांत घोडे व त्यांवर बसलेले स्वार मीं पाहिले; त्यांस अग्नि, नीळ व गंधक यांच्या रंगांचीं उरस्त्राणें होतीं. त्या घोड्यांचीं डोकीं सिंहांच्या डोक्यांसारखीं होतीं; आणि त्यांच्या तोंडांतून अग्नि, धूर व गंधक हीं निघत होतीं. १८ त्यांच्या तोंडांतून निघणारे अग्नि, धूर व गंधक या तीन पीडांमुळें तृतीयांश मनुष्यें जिवें मारलीं गेलीं. १९ त्या घोड्यांची शक्ति त्यांच्या तोंडांत व त्यांच्या शेपटांत आहे; त्यांचीं शेपटें सापांसारिखीं असून त्यांस डोकीं आहेत, आणि त्यांनीं ते उपद्रव करितात. २० त्या पीडांनीं जिवें न मारिल्या गेलेल्या अशा बाकीच्या 'मनुष्यांनीं आपल्या हातच्या कृत्यांविषयीं' पश्चात्ताप केला नाहीं; म्हणजे 'भूतें व ज्यांस पाहतां, ऐकतां व चालतां येत नाहीं अशा सोन्याच्या, रुप्याच्या, पितळेच्या, दगडाच्या व लाकडाच्या मूर्ति' यांची पूजा करणें त्यांनीं सोडिलें नाहीं; २१ आणि त्यांनीं केलेल्या नरहत्या, 'चेटकें, जारकर्मे' व चोऱ्या यांबद्दलहि पश्चात्ताप केला नाहीं.

## बलवान् दूत व लहानसें पुस्तक

१० १ मीं दुसरा एक बलवान् देवदूत स्वर्गांतून उतरतांना पाहिला; तो मेघवेष्टित असून त्याच्या डोक्यावर मेघधनुष्य होतें, त्याचें तोंड सूर्यासारिखें, व त्याचे पाय अग्निस्तंभांसारिखे होते; २ त्याच्या हातीं उघडलेलें एक लहानसें पुस्तक होतें; त्यानें आपला उजवा पाय समुद्रावर व डावा पाय भूमीवर ठेविला व तो सिंहगर्जनेप्रमाणें मोठ्यानें ओरडला; ३ आणि तो ओरडला तेव्हां सात गर्जनांनीं आपापले शब्द काढिले. ४ त्या सात

गर्जनांनीं शब्द काढिले तेव्हां मी लिहिणार होतों; इत-
क्यांत स्वर्गांतून झालेली वाणी मीं ऐकली; ती म्हणाली :
सात गर्जनांनीं काढिलेले शब्द गुप्त ठेव, ते लिहूं नको. ५
ज्या देवदूताला समुद्रावर व भूमीवर उभें राहिलेलें मीं
पाहिलें, त्यानें ‘आपला उजवा हात स्वर्गाकडे वर करून,
६ जो युगानुयुग जीवंत आहे, ज्यानें आकाश व त्यांत जें
आहे तें, पृथ्वी व तिजवर जें आहे तें, आणि समुद्र व त्यांत
जें आहे तें उत्पन्न केलें, त्याची शपथ वाहून म्हटलें :’ आणखी
अवकाश लागणार नाहीं; ७ तर सातव्या देवदूताची वाणी
होईल त्या दिवसांत म्हणजे तो देवदूत करणा वाजविण्याच्या
लागांत असेल, तेव्हां देवानें ‘आपले दास संदेष्टे’ यांस
सुवार्ता सांगितली, तदनुसार ‘ त्याचें गूज ’ पूर्ण होईल.
८ स्वर्गांतून झालेली जी वाणी मीं ऐकली होती ती
मजबरोबर पुनः बोलतांना मीं ऐकली; ती म्हणाली, समु-
द्रावर व भूमीवर उभे राहिलेल्या देवदूताच्या हातांतलें
उघडलेलें पुस्तक जाऊन घे. ९ तेव्हां मीं त्या देवदूताकडे
जाऊन, ‘ तें लहानसें पुस्तक ’ मला दे, असें म्हटलें,
‘तो मला म्हणाला,’ हें घे ‘आणि खाऊन टाक;’ ‘तें
तुझें पोट ’ कडू करील तरी ‘ तुझ्या तोंडांत ’ मधासारखें
गोड लागेल. १० तेव्हां मीं देवदूताच्या हातांतून ‘तें
लहानसें पुस्तक घेतलें व खाऊन टाकिलें; तें माझ्या तोंडांत
मधासारखें गोड लागलें;’ तरी तें खाल्ल्यावर माझें पोट
कडू झालें. ११ तेव्हां ते मला म्हणाले, बहुत ‘ लोक, राष्ट्रें,
भाषा व राजे यांजविषयीं तूं पुनः संदेश दिला पाहिजे. ’

## दोन साक्षीदार

१ नंतर काठीसारखा एक बोरू कोणीएकानें
११ मला दिला, आणि म्हटलें: ऊठ, देवाचें मंदिर,
वेदी व त्यांत उपासना करणारे लोक यांचें माप
घे; २ तरी मंदिराबाहेरचें अंगण सोड, त्याचें माप घेऊं
नको; कारण तें ‘ विदेशी लोकांस’ दिलें आहे; आणि पवित्र
नगर ते बेचाळीस महिने ‘तुडवितील.’ ३ माझे दोन साक्षी
यांस मी नेमून ठेवीन, ते तरट पांघरून एक हजार दोनशें
साठ दिवस संदेश सांगतील. ४ ‘पृथ्वीच्या प्रभूसमोर उभीं
असणारीं दोन जैतून झाडें’ व दोन ‘समया’ हीं ते आहेत.
५ त्यांस कोणीं उपद्रव करूं पाहिल्यास ‘त्यांच्या तोंडांतून
अग्नि निघून त्यांच्या वैऱ्यांस खाऊन टाकितो;’ कोणीं
त्यांस उपद्रव करण्याची इच्छा धरल्यास त्यानें याचप्रमाणें
जीवें मारिलें जावें. ६ त्याच्या संदेश सांगण्याच्या दिवसांत
‘पाऊस पडूं नये’ म्हणून आकाश बंद करावयाचा त्यांस
अधिकार दिलेला आहे; ‘पाण्याचें रक्त करण्याचा’ अधि-
कार त्यांस पाण्यावर आहे, आणि वाटेल तेव्हां ‘पृथ्वीला
सर्व पीडांनीं पीडित करण्याचाहि’ त्यांस अधिकार ‘आहे.’
७ त्यांनीं आपलें साक्ष देणें समाप्त केल्यावर ‘अगाधकूपां-
तून वर येणारें श्वापद त्यांजबरोबर लढाई करील’ आणि
‘त्यांस जिंकून’ जिवें मारील; ८ आणि दृष्टांतरूपानें ‘सदोम,’
मिसर म्हटलेलें असें जें मोठें नगर, आणि ज्यांत त्यांच्या
प्रभूला वधस्तंभावर खिळिलें होतें त्याच्या रस्त्यावर त्यांचीं
प्रेतें पडतील. ९ तीं त्यांचीं प्रेतें लोक, वंश, भाषा व राष्ट्रें
यांपैकीं तेथें असलेले इसम साडेतीन दिवस पाहतील आणि
तीं कबरेंत ठेवूं देणार नाहींत. १० त्यांवरून पृथ्वीवर
राहणारे जन आनंद व ‘उत्साह’ करितील व एकमेकांस
भेटी पाठवितील; कारण त्या दोघां संदेष्ट्यांनीं पृथ्वीवर
राहणाऱ्या जनांस पीडा दिली होती. ११ पुढें साडेतीन
दिवसांनंतर ‘जीवनी आत्मा’ देवापासून येऊन ‘त्यामध्यें
शिरला, तेव्हां ते आपल्या पायांवर उभे राहिले;’ आणि
ज्यांनीं त्याला पाहिलें त्यांना मोठें ‘भय प्राप्त झालें;’ १२
तेव्हां स्वर्गांतून निघालेली मोठी वाणी त्यांनीं आपणांबरो-
बर बोलतांना ऐकली; ती म्हणाली, एथें वर या. मग ते
मेघारूढ होऊन ‘स्वर्गांत’ वर गेले; तेव्हां त्यांचे वैरी त्यांस
पाहत होते. १३ त्याच घटकेस ‘मोठा भूमिकंप’ झाला,
तेव्हां त्या नगराचा दहावा भाग ‘पडला,’ भूमिकंपानें सात
हजार मनुष्यें ठार झालीं आणि बाकीचीं भयभीत होऊन
‘त्यांनीं स्वर्गीय देवाचें’ गौरव केलें.

१४ दुसरा अनर्थ होऊन गेला; पाहा, तिसरा अनर्थ
लवकर येत आहे.

## सातवा करणा

१५ सातव्या देवदूतानें करणा वाजविला; तों स्वर्गांत
मोठ्या वाणी झाल्या; त्या म्हणाल्या :

जगाचें ‘ राज्य ’ आमच्या ‘ प्रभूचें व त्याच्या
ख्रिस्ताचें ’ झालें; ‘तो युगानुयुग राज्य करील.’

१६ तेव्हां देवासमोर आपल्या आसनांवर बसलेले
चोवीस वडील उपडे पडून देवाला नमस्कार घालून
म्हणाले :
१७ 'हे प्रभु देवा, हे सर्वसत्ताधारी, जो तूं आहेस' व
होतास तो तूं आपलें महान् सामर्थ्य हातीं घेऊन
'राज्यारूढ झालास' म्हणून आम्ही तुझें आभारप्रदर्शन
करितों. १८ 'राष्ट्रें क्रोधाविष्ट झालीं,' तुझ्या 'क्रोधाची'
वेळ आली; मृतांचा न्याय करण्याची वेळ, आणि 'तुझे
दास संदेष्टे,' तुझे पवित्र जन, तुझ्या नामाची 'भीति
बाळगणारे लहानथोर' यांस वेतन देण्याची वेळ, आणि
पृथ्वीचा नाश करणाऱ्यांचा नाश करण्याची वेळ आली
आहे.
१९ तेव्हां स्वर्गांतलें देवाचें मंदिर उघडलें, 'त्याच्या
मंदिरांत त्याच्या कराराचा कोश' दृष्टीस पडला आणि
'विजा,' भिन्नभिन्न वाणी, 'गर्जना,' भूमिकंप व 'मोठ्या
गारांची वृष्टि' हीं झालीं.

## स्त्री व अजगर यांचा साक्षात्कार

१२ १ नंतर स्वर्गांत एक मोठें चिन्ह दृष्टीस पडलें,
एक स्त्री दिसली, ती सूर्य पांघरलेली होती आणि
तिच्या पायांखालीं चंद्र व तिच्या मस्तकावर
बारा ताऱ्यांचा मुगूट होता. २ ती गरोदर होती आणि
'वेणा देऊन प्रसूतीच्या कष्टांनीं ओरडत होती.' ३
स्वर्गांत दुसरें एक चिन्ह दृष्टीस पडलें; पाहा, एक
मोठा अग्निवर्ण अजगर दिसला, त्याला सात डोकीं व
'दहा शिंगें' होतीं, आणि त्याच्या डोक्यांवर सात
मुगूट होते. ४ त्याच्या शेपटानें 'आकाशांतील ताऱ्यांचा'
तृतीयांश ओढला जाऊन 'तो पृथ्वीवर पडला;' आणि
ती स्त्री प्रसवेल तेव्हां तिचें मूल खाऊन टाकावें म्हणून
तो अजगर, त्या प्रसवणाऱ्या स्त्रीपुढें उभा राहिला होता.
५ इतक्यांत ती पुत्र 'प्रसवली;' सर्व 'राष्ट्रांवर लोखंडी
दंडानें' राज्य 'करील' असें 'पुंसंतान' प्रसवली; तें
तिचें मूल देवाकडे व त्याच्या राजासनाकडे वर नेण्यांत
आलें. ६ ती स्त्री रानांत पळून गेली, तेथें तिचें एक
हजार दोनशें साठ दिवस पोषण व्हावें म्हणून देवानें
तयार केलेली तिची जागा होती. ७ तेव्हां स्वर्गांत युद्ध
झालें; 'मीखाएल' व त्याचे दूत अजगराबरोबर युद्ध
करण्यास निघाले; आणि त्यांबरोबर अजगर व त्याचे दूत
लढले; ८ तरी त्यांचें कांहीं चाललें नाहीं, आणि स्वर्गांत
त्यांचें ठिकाणहि आणखी सांपडलें नाहीं. ९ मग मोठा अजगर
खालीं टाकण्यांत आला, सर्व जगाला ठकविणारा 'दियाबल' व
'सैतान' म्हटलेला जुनाट 'साप' ह्याला खालीं पृथ्वीवर टाक-
ण्यांत आलें, व त्यांबरोबर त्याच्या दूतांस टाकण्यांत आलें.
१० तेव्हां मीं स्वर्गांत मोठी वाणी ऐकली; ती म्हणाली :

आतां तारण, सामर्थ्य व राज्य आमच्या देवाचें
झालें आहे व अधिकार त्याच्या ख्रिस्ताचा झाला
आहे; कारण जो आमच्या बंधूंना दोष देणारा,
आमच्या देवासमोर रात्रंदिवस त्यांजवर दोषारोप
करणारा, तो खालीं टाकण्यांत आला आहे. ११
त्याला त्यांनीं कोकऱ्याच्या रक्तामुळें व आपल्या
साक्षीच्या वचनामुळें जिंकिलें आणि त्यांजवर
मरावयाची पाळी आली तरी त्यांनीं आपल्या जिवा-
वर प्रीति केली नाहीं. १२ यास्तव 'स्वर्गांनो,'
व त्यांत वसणाऱ्यांनो, 'उत्साह करा;' पृथ्वी व
समुद्र, यांवर, अनर्थ ओढवला आहे. कारण आपला
काळ थोडा आहे असें समजून अतिशय संतप्त
झालेला सैतान उतरून तुम्हांकडे गेला आहे.

१३ आपण पृथ्वीवर टाकले गेलों असें पाहून अजगरानें,
जी स्त्री पुंसंतान प्रसवली होती, तिचा पाठलाग केला.
१४ त्या स्त्रीनें आपल्या ठिकाणीं रानांत उडून जावें म्हणून
तिला मोठ्या गरुडाचे दोन पंख देण्यांत आले होते; तेथें
एक 'काळ, दोन काळ व अर्धकाळ' सर्पापासून सुरक्षित
राहून तिचें पोषण व्हावयाचें होतें. १५ मग त्या स्त्रीनें
वाहून जावें म्हणून त्या सर्पानें तिच्यामागून नदीसारखा
पाण्याचा प्रवाह आपल्या तोंडांतून सोडिला; १६ परंतु
स्त्रीला भूमि साहाय्य झाली; तिनें आपलें तोंड उघडून
अजगरानें आपल्या तोंडांतून सोडिलेली नदी गिळून
टाकिली. १७ तेव्हां अजगर स्त्रीवर रागावला आणि
देवाच्या आज्ञा पाळणारे व येशूविषयींची साक्ष पटविणारे
असे तिच्या संतानांपैकीं बाकीचे लोक यांजबरोबर लढाई
करण्यास तो निघून गेला; १८ आणि तो समुद्राच्या

वाळूवर उभा राहिला.

### श्वापदांचा साक्षात्कार

१ नंतर मीं एक 'श्वापद समुद्रांतून वर येतांना'
१३ पाहिलें; त्याला 'दहा शिंगें' व सात डोकीं
असून त्याच्या शिंगांवर दहा मुकुट आणि त्याच्या
डोक्यांवर देवनिंदात्मक नांवें होतीं. २ जें 'श्वापद' मीं
पाहिलें तें 'चित्त्यासारिखें' होतें, त्याचे पाय 'अस्व-
लाच्या पायांसारिखे' होते व त्याचें तोंड 'सिंहाच्या'
तोंडासारिखें होतें; त्याला अजगरानें आपली शक्ति, आपलें
आसन व मोठा अधिकार दिला. ३ त्याच्या डोक्यांपैकीं
एक डोकें मरण येईसा घाव झाल्यासारखें माझ्या दृष्टीस
पडलें; तरी त्याचा प्राणघातक घाव बरा झाला; तेव्हां सर्व
पृथ्वी आश्चर्य करीत त्या श्वापदामागून गेली. ४ अजगरानें
त्या श्वापदास आपला अधिकार दिला होता म्हणून त्यांनीं
अजगराला नमस्कार घातला; आणि ते श्वापदाला नमस्कार
घालतांना म्हणाले, या श्वापदासमान कोण आहे? याच्या-
बरोबर कोणाच्यानें लढवेल? ५ त्याला 'मोठमोठ्या' व
देवनिंदक 'गोष्टी बोलणारें तोंड' दिलें होतें, व
बेचाळीस महिने त्याला आपलें 'काम चालविण्याचा'
अधिकार दिला होता. ६ त्यानें देवाविरुद्ध निंदा करण्यास,
म्हणजे त्याचें नाम, त्याचा मंडप व स्वर्गनिवासी लोक
यांची निंदा करण्यास तोंड सोडिलें. ७ पवित्र जनांबरोबर
लढण्याचें व त्यांस जिंकण्याचें कार्य त्याकडे सोपविलें होतें;
आणि सर्व वंश, लोक, भाषा व राष्ट्रें यांवर अधिकार
त्याला दिला होता. ८ 'ज्या कोणाचीं' नांवें जगाच्या
स्थापनेपासून 'वधलेल्या कोकऱ्याच्या जीवनी पुस्तकांत
लिहिलेलीं' नाहींत असे पृथ्वीवर राहणारे सर्व जण त्या
श्वापदाला नमन करितील. ९ ज्या कोणाला कान आहे तो
ऐको. १० 'कैदेंत जावयाचा तो कैदेंत जातो; कोणी
कोणास तरवारीनें' जिवें मारील तर त्याला तरवारीनें
मरणें भाग आहे. यावरून पवित्र जनांचा धीर व विश्वास
दिसून येतो.

११ नंतर मीं दुसरें एक श्वापद भूमींतून वर येतांना
पाहिलें; त्याला कोकऱ्यासारखीं दोन शिंगें होतीं; तें अज-
गरासारिखें बोलत होतें. १२ तें पहिल्या श्वापदाचा सर्व
अधिकार त्याच्यासमक्ष चालवितें आणि ज्या पहिल्या
श्वापदाचा प्राणघातक घाव बरा झाला होता, त्याला पृथ्वीनें
व तिजवर राहणाऱ्या जणांनीं नमन करावें असें करितें.
१३ तें मोठीं चिन्हें करितें; मनुष्यांसमक्ष आकाशांतून
पृथ्वीवर अग्नि पडावा असें देखील करितें. १४ जीं चिन्हें
त्या श्वापदासमक्ष करण्याचें त्याकडे सोपविलें
होतें, त्यावरून तें पृथ्वीवर राहणाऱ्या जणांस ठकवितें;
म्हणजे तरवारीचा घाव लागला असून, जीवंत राहि-
लेल्या श्वापदाप्रीत्यर्थ मूर्ति करावयास पृथ्वीवर राहणाऱ्या
जणांस तें सांगतें. १५ त्या श्वापदाच्या मूर्तींत प्राण
घालावयाचें त्याच्या हातीं दिलें होतें, यासाठीं कीं
श्वापदाच्या 'मूर्तीनें बोलावें' आणि 'जे कोणी' त्या
श्वापदाच्या 'मूर्तीला नमन करणार नाहींत' ते जिवें
मारिले जावेत असें तिनें घडवून आणावें. १६ लहान-
थोर, धनवान, दरिद्री, स्वतंत्र व दास, या सर्वांनीं
आपल्या उजव्या हातावर किंवा आपल्या कपाळावर
खूण करून घ्यावी; १७ आणि ज्यांवर ती खूण म्हणजे
त्या श्वापदाचें नांव किंवा नांवाची दर्शविलेली संख्या
आहे, त्यांशिवाय कोणाला विकत घेतां येऊं नये किंवा
विकत देतां येऊं नये, असें तें करितें. १८ हें अक्कलेचें
काम आहे; ज्याला बुद्धि आहे त्यानें श्वापदाचें नांव
त्या संख्येवरून काढावें; त्या संख्येवरून मनुष्याचा
बोध होतो; ती त्याची संख्या सहाशें सासष्ट होय.

### कोकरा व उद्धरलेले यांचा साक्षात्कार

१ नंतर मीं पाहिलें, तों पाहा, कोकरा
१४ सीयोन डोंगरावर उभा राहिलेला दृष्टीस पडला;
त्याजबरोबर त्याचें नाम व त्याच्या पित्याचें
नाम 'कपाळांवर' लिहिलेले असे एकशें चवेचाळीस
हजार इसम होते; २ आणि 'बहुत जलप्रवाहांच्या
शब्दासारिखी' व मोठ्या गर्जनेच्या शब्दासारिखी स्वर्गां-
तून निघालेली वाणी मीं ऐकली; आणि जी वाणी
मीं ऐकली ती, जसे काय वीणाकरी आपल्या वीणा
वाजवीत आहेत, अशी होती. ३ ते राजासनासमोर
आणि चार प्राणी व वडील यांजसमोर जसें काय
'एक नवें गीत गात होते;' तें गीत, पृथ्वीवरून

विकत घेतलेले एकशें चवेचाळीस हजार लोक यांजशिवाय कोणाला शिकतां येत नव्हतें. ४ स्त्रीसंगानें मलिन न झालेले ते हेच आहेत, ते शुद्ध आहेत. जेथें कोठें कोकरा जातो तेथें त्याच्यामागें जाणारे ते हे आहेत. ते देवासाठीं व कोकऱ्यासाठीं प्रथम फळ असे मनुष्यांतून विकत घेतलेले आहेत. ५ त्यांच्या 'तोंडांत असत्य आढळलें नाहीं;' ते निष्कलंक आहेत.

### तीन देवदूतांचा साक्षात्कार

६ नंतर मीं दुसरा एक देवदूत अंतराळाच्या मध्यभागीं उडतांना पाहिला, त्याच्याजवळ पृथ्वीवर राहणारे जन म्हणजे प्रत्येक राष्ट्र, वंश, भाषा व लोक यांस सांगावयास सार्वकालिक सुवार्ता होती. ७ तो मोठ्यानें म्हणाला: देवाची भीति बाळगा व त्याचें गौरव करा, कारण त्याची न्यायनिवाडा करावयाची घटिका आली आहे; 'ज्यानें आकाश, पृथ्वी, समुद्र' व पाण्याचे झरे 'उत्पन्न केले,' त्याला नमन करा.

८ त्या देवदूतामागून दुसरा देवदूत येऊन म्हणाला: 'पडली,' मोठी बाबेल पडली; तिनें 'आपल्या' जारकर्माचा क्रोधरूपी 'द्राक्षारस' सर्व राष्ट्रांना पाजिला.

९ त्यांच्यामागून तिसरा देवदूत येऊन मोठ्यानें म्हणाला: जो कोणी श्वापदाला व त्याच्या मूर्तीला नमन करितो, आणि आपल्या कपाळावर किंवा आपल्या हातावर त्याची खूण करून घेतो, १० तोहि 'देवाच्या क्रोधाच्या प्याल्यांत निरा घातलेला' त्याचा कोपरूपी 'द्राक्षारस पिईल.' आणि पवित्र देवदूतांसमक्ष व कोकऱ्यासमक्ष त्याला 'अग्नि व गंधक' यांपासून पीडा होईल. ११ त्यांच्या पीडेचा 'धूर युगानुयुग वर येतो;' आणि जे श्वापदाला व त्याच्या मूर्तीला नमन करितात त्यांस, आणि जो कोणी त्याच्या नामाची खूण करून घेतो त्यास 'रात्रंदिवस' विश्रांति मिळत नाहीं. १२ देवाच्या आज्ञा पाळणारे व येशूवरील विश्वास धरून राहणारे पवित्र जन यांचा धीर यावरून दिसून येतो.

१३ तेव्हां स्वर्गांतून झालेली वाणी मीं ऐकली; ती म्हणाली, लिही: प्रभूमध्यें मरणारे आतांपासून धन्य आहेत. आत्मा म्हणतो: खरेंच, आपल्या कष्टांपासून सुटून त्यांस विसावा मिळेल; त्यांचीं कृत्यें त्यांजबरोबर जातात.

### हंगाम व पृथ्वीची कापणी

१४ नंतर मीं पाहिलें, तों पांढरा मेघ व त्या मेघावर बसलेला मनुष्याच्या पुत्रासारखा एक जण दृष्टीस पडला; त्याच्या मस्तकावर सोन्याचा मुगूट व त्याच्या हातीं तीक्ष्ण धारेचा विळा होता. १५ तेव्हां दुसरा एक देवदूत मंदिरांतून निघून मेघावर बसलेल्या पुरुषास उच्च वाणीनें म्हणाला, तूं आपला 'विळा चालवून' कापणी कर; कारण 'कापणीची वेळ आली आहे;' पृथ्वीचें पीक पिकून गेलें आहे. १६ तेव्हां मेघावर बसलेल्या पुरुषानें आपला विळा पृथ्वीवर चालविला; आणि पृथ्वीची कापणी झाली.

१७ मग दुसरा एक देवदूत स्वर्गांतील मंदिरातून निघाला, त्याच्याजवळहि तीक्ष्ण धारेचा विळा होता. १८ ज्याला अग्नीवर अधिकार आहे असा दुसरा एक देवदूत वेदीजवळून बाहेर निघाला; त्यानें ज्याच्याजवळ तीक्ष्ण धारेचा 'विळा' होता त्याला उच्च वाणीनें म्हटलें, तूं आपला तीक्ष्ण धारेचा 'विळा चालवून' पृथ्वीच्या द्राक्षीचे घड तोडून घे; तिचीं द्राक्षें परिपक्व झालीं आहेत. १९ तेव्हां त्या देवदूतानें आपला विळा पृथ्वीवर चालविला आणि पृथ्वीच्या द्राक्षीचे घड तोडून देवाच्या क्रोधाच्या मोठ्या द्राक्षकुंडांत टाकिले. २० तें द्राक्षकुंड नगराबाहेर तुडविलें गेलें; त्यांतून रक्त वाहिलें, त्याचा प्रवाह घोड्यांच्या लगामांस पोहोंचेइतका असून तो शंभर कोसपर्यंत वाहत गेला.

### सात वाट्या आणि पीडा यांचा साक्षात्कार

१५ १ नंतर मीं अत्यंत आश्चर्यकारक असें दुसरें एक चिन्ह स्वर्गांत पाहिलें; 'सात पीडा' घेतलेले सात देवदूत दृष्टीस पडले; या पीडा शेवटल्या होत्या, कारण त्यांच्यायोगें देवाचा क्रोध पूर्ण झाला.

२ मग जसा काय अग्निमिश्रित कांचेचा समुद्र असा कांहीं माझ्या दृष्टीस पडलें; त्या कांचेच्या समुद्रावर श्वापदापासून, त्याच्या मूर्तीपासून, व त्याच्या नामसंख्येपासून जय मिळविणारे लोक हातांत देवाच्या वीणा घेऊन

उभे राहिलेले दृष्टीस पडले. ३ ‘ ते देवाचा दास मोशे
याचें गीत, ’ व कोकऱ्याचें ‘ गीत गातांना ’ म्हणतात :

हे ‘ सर्वसत्ताधारी प्रभु देवा, तुझीं कृत्यें थोर ’
व ‘ आश्चर्यकारक आहेत; ’ हे ‘ राष्ट्राधिपते, ’
तुझे ‘ मार्ग नीतीचे व सत्य ’ आहेत. ४ ‘ हे प्रभो,
तुला कोण भिणार नाहीं ? ’ ‘ तुझ्या नामाचा महिमा
कोण करणार नाहीं ? ’ कारण ‘ पवित्र ’ असा
कायतो तूंच एक आहेस; आणि तुझीं न्याय्यकृत्यें
प्रकट झालीं आहेत म्हणून ‘ सर्व राष्ट्रें येऊन तुझ्या-
समोर नमन करितील. ’

५ नंतर मीं पाहिलें, तों ‘ साक्षीच्या मंडपाचें ’ स्वर्गां-
तील मंदिर उघडलें; ६ आणि स्वच्छ व तेजस्वी, ‘तागाचीं
वस्त्रें परिधान केलेले ’ व उरांवरून सोन्याचा पट्टा बांध-
लेले असे, ‘ सात पीडा ’ घेतलेले ते सात देवदूत त्या
मंदिरांतून बाहेर आले. ७ त्या चार प्राण्यांपैकीं एकानें
युगानुयुग जीवंत असणाऱ्या देवाच्या क्रोधानें भरलेल्या
सोन्याच्या सात वाट्या त्या सात देवदूतांस दिल्या. ८
तेव्हां देवाचें ‘ तेज ’ व पराक्रम यांपासून निघालेल्या
‘ धुरानें मंदिर भरून गेलें; ’ आणि त्या सात देवदूतांच्या
‘ सात पीडा ’ संपेपर्यंत ‘ कोणाच्यानें ’ मंदिरांत ‘ जावलें
नाहीं. ’

१६ १ नंतर मीं मंदिरांतून निघालेली एक मोठी
वाणी ऐकली; ती त्या सात देवदूतांस म्हणाली :
जा, देवाच्या क्रोधाच्या सात वाट्या पृथ्वीवर
ओता.

२ तेव्हां पहिल्यानें जाऊन आपली वाटी पृथ्वीवर
ओतिली; तों त्या श्वापदाची खूण धारण केलेले आणि
त्याच्या मूर्तीला नमन करणारे लोक यांवर वाईट व दुष्ट
रोगाची धाड पडली.

३ दुसऱ्यानें आपली वाटी समुद्रांत ओतिली; तेव्हां
‘ तो ’ मृताच्या रक्तासारखा ‘ रक्तमय झाला ’ आणि
समुद्रांतील सर्व जीवसृष्टि नष्ट झाली.

४ तिसऱ्यानें आपली वाटी नद्या व पाण्याचे झरे यांत
ओतिली; ‘ तों तीं रक्तमय झालीं, ’ ५ तेव्हां मीं जलांच्या
देवदूताला असें बोलतांना ऐकलें : ‘ जो तूं आहेस ’ व
होतास, ‘ जो तूं पवित्र ’ त्या तूं असा न्यायनिवाडा केला
म्हणून तूं ‘ न्यायवान् ’ आहेस; ६ यांनीं पवित्र जनांचें व
संदेष्ट्यांचें ‘ रक्त पाडिलें ’ आणि तूं ‘ त्यांस रक्त प्यावयास’
लाविलें आहे; ह्यास ते पात्र आहेत. ७ नंतर मीं वेदीला
असें बोलतांना ऐकलें : हो, ‘ हे सर्वसत्ताधारी प्रभु देवा,
तुझे न्याय सत्य ’ व ‘ नीतीचे ’ आहेत.

८ चवथ्यानें आपली वाटी सूर्यावर ओतिली; त्याकडे
अग्नीच्या योगें मनुष्यांना करपवून टाकण्याचें सोपविलें
होतें. ९ मनुष्यें कडक उन्हानें करपून गेलीं; तेव्हां त्या
पीडांवर ज्याला अधिकार आहे त्या देवाच्या नामाची
निंदा त्यांनीं केली आणि देवाचें गौरव करण्यासाठीं पश्चात्ताप
करावा तो त्यांनीं केला नाहीं.

१० पांचव्यानें आपली वाटी श्वापदाच्या आसनावर
ओतिली; तों त्याचें राज्य ‘ अंधकारमय ’ झालें, आणि
लोकांनीं दुःखामुळें आपल्या जिभा चाविल्या; ११
आपल्या वेदनांमुळें व आपल्या व्रणांमुळें त्यांनीं स्वर्गाच्या
देवाची निंदा केली, आणि आपल्या कर्मांचा पश्चात्ताप
केला नाहीं.

१२ सहाव्यानें आपली वाटी फरात महानदावर
ओतिली; तों सूर्याच्या उगवतीपासून येणाऱ्या राजांची
वाट सिद्ध व्हावी म्हणून तिचें पाणी आटून गेलें. १३
नंतर मीं ‘ बेडकासारखे ’ तीन अशुद्ध आत्मे अजगराच्या
तोंडांतून, श्वापदाच्या तोंडांतून व खोट्या संदेष्ट्याच्या
तोंडांतून निघतांना पाहिलें. १४ ते चिन्हें करणारे भूतांचे
आत्मे आहेत; ते संपूर्ण जगांतील राजांस ‘ सर्वसत्ताधारी
देवाच्या ’ त्या मोठ्या दिवसाच्या लढाईसाठीं एकत्र
करावयास त्यांजकडे बाहेर जातात. १५ ( पाहा, मी
चोरासारखा येतों. आपण नग्न असें चालूं नये व आपली
लाज लोकांस दिसूं नये म्हणून जो जागृत राहतो व
आपलीं वस्त्रें राखितो तो धन्य. ) १६ त्यांनीं त्यांस इब्री
भाषेंत ‘ हर्मगिदोन ’ म्हटलेल्या ठिकाणीं एकत्र केलें.

१७ सातव्यानें आपली वाटी अंतराळांत ओतिली; तों
मोठी ‘ वाणी मंदिरांतून, ’ राजासनापासून निघाली;
ती म्हणाली, झालें; १८ तेव्हां ‘ विजा, ध्वनि व
गर्जना ’ झाल्या; शिवाय मोठा भूमिकंप झाला, तो इतका

कीं ‘पृथ्वीवर’ मनुष्य ‘झाल्यापासून’ इतका मोठा ‘कधीं झाला नव्हता.’ १९ मोठ्या नगरीचे तीन विभाग झाले; राष्ट्रांचीं नगरें कोसळलीं आणि त्यानें ‘आपल्या’ ‘तीव्र क्रोधाच्या द्राक्षारसाचा प्याला’ तिला द्यावा, म्हणून देवासमोर ‘मोठ्या बाबेल’ नगरीचें स्मरण करण्यांत आलें. २० सर्व बेटें पळून गेलीं, आणि डोंगरांचा थांग नाहींसा झाला. २१ सुमारें एक मण वजनाच्या ‘मोठ्या गारा’ आकाशांतून मनुष्यांवर पडल्या; तेव्हां गारांच्या पीडेमुळें लोकांनीं देवाची निंदा केली; कारण त्या गारांची पीडा ‘पराकाष्ठेची’ होती.

## मोठी कलावंतीण व श्वापद यांचा साक्षात्कार

१७ १ नंतर सात वाट्या घेतलेल्या सात देवदूतांपैकीं एक जण येऊन मजबरोबर बोलूं लागला; तो म्हणाला, इकडे ये, म्हणजे ‘बहुत जलांवर’ बसलेली मोठी कळवंतीण हिचा झालेला न्यायनिवाडा तुला दाखवितों; २ ‘तिच्याबरोबर पृथ्वीवरील राजांनीं जारकर्म केलें’ आणि ‘तिच्या’ जारकर्मरूपी ‘द्राक्षारसानें पृथ्वीवर’ राहणारे जण ‘मस्त झाले.’ ३ मग मी आत्म्यानें संचारलेला असतांना त्यानें मला रानांत नेलें; तों देवनिंदात्मक नांवांनीं भरलेल्या, सात डोकीं व दहा शिंगें असलेल्या किरमिजी रंगाच्या ‘श्वापदावर’ बसलेली एक स्त्री दृष्टीस पडली. ४ ती स्त्री जांभळीं व किरमिजी वस्त्रें ल्यालेली, आणि सोनें, मूल्यवान् रत्नें व मोत्यें यांनीं शृंगारलेली होती. तिच्या हातांत अमंगळ पदार्थांनीं म्हणजे तिच्या जारकर्मांच्या मळानें भरलेला ‘सोन्याचा प्याला’ होता; ५ तिच्या कपाळावर ‘मोठी बाबेल, कळवंतिणीची’ व पृथ्वीवरील अमंगळपणाची आई, हें गूढार्थक नांव लिहिलेलें होतें. ६ ती स्त्री पवित्र जनांच्या रक्तानें व येशूच्या साक्ष्यांच्या रक्तानें मस्त झालेली माझ्या दृष्टीस पडली. तिला पाहून मला फार आश्चर्य वाटलें. ७ देवदूतानें मला म्हटलें, तुला आश्चर्य कां वाटलें? ती स्त्री आणि सात डोकीं व दहा शिंगें असलेलें तिला वाहून नेणारें श्वापद यांचें गूज मी तुला सांगतों. ८ जें ‘श्वापद’ तूं पाहिलें तें होतें आणि नाहीं; तें ‘अगाधकूपांतून वर येणार’ आहे व नाशांत जाणार आहे. जगाच्या स्थापनेपासून ज्यांचें नांव ‘जीवनी पुस्तकांत लिहिलें’ नाहीं असे पृथ्वीवर राहणारे जन, तें श्वापद होतें, नाहीं व येणार असें पाहून आश्चर्य करितील. ९ हें ज्ञानी मनाचें काम आहे. तीं सात डोकीं सात डोंगर आहेत; त्यांवर ती स्त्री बसली आहे; १० आणि तीं डोकीं सात राजे आहेत, त्यांपैकीं पांच पडले आहेत, एक आहे आणि एक अद्याप आला नाहीं; तो आल्यावर त्याला थोडा वेळ राहावें लागेल. ११ जें श्वापद होतें आणि नाहीं तें स्वतः आठवा राजा आहे; तो त्या सातांपासून झालेला आहे; आणि तो नाशांत जाणार आहे. १२ जीं ‘दहा शिंगें’ तूं पाहिलीं ‘तीं दहा राजे आहेत,’ त्यांस अद्यापि राज्य मिळालें नाहीं; तरी त्यांस श्वापदाबरोबर तासभर राजांच्या सारखा अधिकार मिळतो. १३ ते एकविचाराचे आहेत आणि ते आपलें सामर्थ्य व अधिकार श्वापदाला देतात. १४ हे कोकऱ्याबरोबर लढतील, परंतु कोकरा त्यांस जिंकील, कारण तो ‘प्रभूंचा प्रभु आणि राजांचा राजा’ आहे; आणि पाचारण केलेले, निवडलेले व विश्वासू असे जे त्याजबरोबर आहेत तेहि विजय मिळवितील. १५ आणखी तो मला म्हणाला, जेथें कळवंतीण बसली आहे, तेथें जीं जलें तूं पाहिलीं ती लोक, जनसमूह, राष्ट्रें, भाषा अशीं आहेत. १६ जीं दहा शिंगें व जें श्वापद तूं पाहिलें तीं कळवंतिणीचा द्वेष करितील व तिला ओसाड व नग्न करितील, तिचें मांस खातील व अग्नीनें तिला जाळून टाकितील. १७ त्यांनीं एकविचारानें वागून देवाचीं वचनें पूर्ण होत तोंपर्यंत आपलें राज्य श्वापदाला द्यावें अशा इराद्यानें कृति करण्याचें देवानें त्यांच्या मनांत घातलें. १८ जी स्त्री तूं पाहिली ती ‘पृथ्वीवरच्या राजांवर’ राज्य करणारी मोठी नगरी आहे.

## मोठ्या नगरीचा अधःपात

१८ १ त्यानंतर मीं दुसऱ्या एका देवदूताला स्वर्गांतून उतरतांना पाहिलें, त्याला मोठा अधिकार होता; आणि त्याच्या तेजानें पृथ्वी प्रकाशित झाली. २ तो मोठ्या उच्च वाणीनें म्हणाला, ‘पडली, मोठी बाबेल पडली;’ ती ‘भूतांची वस्ती’ व सर्व प्रकारच्या अशुद्ध आत्म्यांचा आश्रय व सर्व प्रकारच्या अशुद्ध व ओंगळ पांखरांचा आश्रय अशी झाली आहे. ३ कारण, ‘तिच्या’

जारकर्माचा क्रोधरूपी ‘द्राक्षारस सर्व राष्ट्रें प्याली आहेत;
पृथ्वीवरील राजांनीं तिच्याबरोबर जारकर्म केलें’ व पृथ्वी-
वरील व्यापारी तिच्या विषयभोगास लाविलेल्या द्रव्यबळानें
धनवान् झाले.

४ मग स्वर्गांतून निघालेली दुसरी एक वाणी मीं
ऐकली; ती म्हणाली: ‘माझ्या लोकांनो,’ तुम्हीं तिच्या
पापांचे वांटेकरी होऊं नये आणि तुम्हांला तिच्या पीडां-
तील कोणतीहि पीडा होऊं नये म्हणून ‘ तिच्यांतून निघा.’
५ कारण तिच्या ‘पापांचा ढीग स्वर्गापर्यंत पोहंचला’ आहे;
आणि तिच्या अधर्मांची आठवण देवानें केली आहे. ६
‘ जसें तिनें दिलें तसें तिला द्या, तिच्या कर्माप्रमाणें’
तिला दुप्पट द्या; तिनें प्याल्यांत जितकें ओतिलें त्याच्या
दुप्पट तुम्ही त्यांत ओता. ७ ज्या मानानें तिनें
आपलें गौरव केलें व विषयभोग घेतला, त्या मानानें तिला
पीडा व दुःख द्या; कारण ती ‘आपल्या मनांत म्हणते, मी
राणी होऊन बसल्यें आहें; मी कांहीं विधवा नाहीं; मी
दुःख पाहणार देखील नाहीं.’ ८ यामुळें तिच्या पीडा
म्हणजे मरण, दुःख व दुष्काळ ‘एका दिवशींच येतील,’
आणि ती अग्नीनें जाळून टाकिली जाईल; कारण ज्यानें
तिचा ‘न्यायनिवाडा केला’ तो ‘प्रभु’ देव ‘सामर्थ्यवान्’
आहे. ९, १० पृथ्वीवरील ज्या राजांनीं तिच्याबरोबर ‘जार-
कर्म’ व विलास ‘केला’ ते तिच्या पीडेच्या भयामुळें दूर
उभे राहून तिच्या जळण्याचा धूर पाहतील तेव्हां तिज-
करितां ‘रडतील व ऊर बडवून घेतील;’ ते म्हणतील,
अनर्थ ! अनर्थ ! बाबेल ही मोठी नगरी होती ! ही बळकट
नगरी होती ! एका क्षणांत तुला न्यायदंड प्राप्त झाला
आहे. ११ पृथ्वीवरील ‘व्यापारी’ तिजसाठीं ‘रडतात व
शोक करितात;’ कारण त्यांचा माल आतां कोणी विकत
घेत नाहीं; १२ सोनें, रुपें, मोल्यवान् रत्नें, मोत्यें,
तागाचें तलम कापड, जांभळ्या रंगाचें कापड, रेशमी
कापड, किरमिजी रंगाचें कापड, सर्व प्रकारचें सुगंधी काष्ठ,
सर्व प्रकारचीं हस्तिदंती पात्रें, सर्व प्रकारचीं अति
मोल्यवान् काष्ठाचीं, पितळेचीं, लोखंडाचीं व संगमरवरी
पाषाणाचीं पात्रें; १३ दालचिनी, सुगंधी उटणीं, धूपद्रव्यें,
सुगंधी तेल, ऊद, द्राक्षारस, जैतुनाचें तेल, सपीठ,
गहूं, गुरें, मेंढरें, घोडे, रथ, दास व ‘मनुष्यांचे
जीव’ हा त्यांचा माल कोणी घेत नाहीं. १४ ज्या
फळफळावळीची तुझ्या जिवाला चटक लागली आहे ती
तुजपासून गेली आहे; आणि मिष्टान्नें व विलासाचे
पदार्थ हे सर्व तुजपासून नाहींतसे झाले आहेत; ते
पुढें कोणाला मिळणारच नाहींत. १५ तिच्यायोगानें
धनवान् झालेले त्या पदार्थांचे ‘ व्यापारी ’ ‘ रडत व
शोक करीत ’ तिच्या पीडेच्या भयामुळें दूर उभे
राहतील; १६ आणि म्हणतील: अनर्थ ! अनर्थ ! पाहा
ही मोठी नगरी ! तागाचीं बारीक वस्त्रें, जांभळीं व
किरमिजी वस्त्रें पांघरलेली, सोनें, मोल्यवान् रत्नें व
मोत्यें यांनीं शृंगारलेली नगरी ! १७ एका क्षणांत या
इतक्या संपत्तीची ओसाडी झाली. सर्व ‘ नाखोदे, ’
गलबतांवरून बंदरोबंदरीं जाणारे सर्व, आणि ‘ खलाशी
व समुद्रावर ’ निर्वाह करणारे सर्व दूर ‘उभे राहिले;’
१८ आणि तिच्या जळण्याचा धूर पाहून आक्रोश
करीत म्हणाले: या मोठ्या नगरी ‘ सारखी कोणती ’
नगरी आहे ? १९ त्यांनीं आपल्या डोक्यांत धूळ
घातली आणि रडत, शोक करीत व आक्रोश करीत,
म्हटलें: अनर्थ ! अनर्थ ! जिच्या ‘ संपत्तीनें समुद्रांत ’
गलबतें बाळगणारे सर्व ‘ श्रीमंत झाले ’ ती मोठी
नगरी ! गेली, गेली ! ती एका क्षणांत ‘ ओसाड झाली.’
२० हे स्वर्गा, अहो पवित्र जनांनो, प्रेषितांनो व
संदेष्ट्यांनो, तिजविषयीं ‘ आनंद करा; कारण, देवानें
तिला दंड करून तुमचा ‘ न्यायनिवाडा केला आहे. ’

२१ नंतर एका बलवान् देवदूतानें जात्याच्या मोठ्या
तळीसारखा ‘ धोंडा ’ उचलिला ‘ आणि ’ तो समुद्रांत
‘ टाकितांना म्हटलें: अशीच ’ ती ‘ मोठी नगरी बाबेल ’
झपाट्यानें टाकिली जाईल ‘ व फिरून ’ सांपडणारच
नाहीं; २२ वीणाकरी, ‘ गवई, पांवा वाजविणारे व
करणेकरी ’ यांचा ‘ शब्द ’ तुझ्यांत ‘ यापुढें ऐकूं येणारच
नाहीं; कोणत्याहि कारागिरीचा कोणताहि कारागीर तुझ्यांत
सांपडणारच नाहीं; ‘ आणि जात्याचा शब्द ’ तुझ्यांत
यापुढें ऐकूं येणारच नाहीं; २३ ‘ दिव्याचा उजेड ’
तुझ्यांत यापुढें दिसणारच नाहीं; आणि ‘ नवऱ्याचा व

नवरीचा ' शब्द तुझ्यांत यापुढें ऐकूं येणारच नाहीं;
तुझे व्यापारी पृथ्वीवरील थोर थोर होते; आणि सर्व
राष्ट्रें 'तुझ्या चेटकानें' ठकविलीं गेलीं. २४ तिच्यामध्यें
संदेष्ट्यांचें, पवित्र जनांचें व 'पृथ्वीवर वधलेल्या सर्वांचें'
रक्त सांपडलें.

## स्वर्गांत जयोत्सव व कोंकऱ्याचें लग्न

१ ह्यानंतर स्वर्गांतील मोठ्या समुदायाची
१९ जशी काय एक मोठी वाणी मीं ऐकली; ती
म्हणाली :

'हालेलूया;' तारण, गौरव व सामर्थ्य हीं आमच्या
देवाचीं आहेत; २ कारण त्याचे न्यायनिर्बंध सत्य
व 'नीतीचे' आहेत; ज्या मोठ्या कळवंतणीनें
आपल्या जारकर्मानें पृथ्वी भ्रष्ट केली तिचा
न्यायनिवाडा त्यानें केला आहे, आपल्या
'दासांच्या रक्ताबद्दल तिचा सूड घेतला आहे.'

३ ते पुनः म्हणाले, 'हालेलूया; तिचा धूर युगानुयुग वर
चढत आहे.' ४ तेव्हां ते चोवीस वडील व ते चार
प्राणी उपडे पडून 'राजासनावर बसलेल्या' देवाला
नमस्कार घालितांना म्हणाले: आमेन; 'हालेलूया.'
५ इतक्यांत 'राजासनापासून' वाणी झाली; ती
म्हणाली :

अहो त्याची भीति बाळगणाऱ्या सर्व लहानथोर
जनांनो, अहो त्याच्या दासांनो, आमच्या देवाचें
स्तवन करा.

६ तेव्हां जणू काय मोठ्या समुदायाची वाणी, बहुत
जलप्रवाहांची वाणी व प्रचंड गर्जनांची वाणी मीं
ऐकली; ती म्हणाली :

हालेलूया; कारण 'सर्वसत्ताधारी' आमचा
'प्रभु देव' यानें 'राज्य हातीं घेतलें आहे.'
७ 'आपण आनंद' व 'उल्लास करूं' व त्याचें गौरव
करूं; कारण कोंकऱ्याचें लग्न आलें आहे, आणि
त्याच्या नवरीनें स्वतःला सजविलें आहे,
८ तिला तेजस्वी व शुद्ध असें तागाचें तलम वस्त्र
परिधान करावयाला दिलें आहे; तें तागाचें
तलम वस्त्र पवित्र जनांचीं नीतिकृत्यें आहेत.

९ तेव्हां तो मला म्हणाला; हें लिही कीं कोंकऱ्याच्या
लग्नाच्या मेजवानीस बोलाविलेले ते धन्य. तो मला
असेंहि म्हणाला; हीं देवाचीं सत्य वचनें आहेत. १०
तेव्हां मी त्याच्या पायां पडून नमस्कार घालणार होतों;
परंतु तो मला म्हणाला; असें करूं नये; मी तुझा
आणि जे येशूविषयींची साक्ष पटवितात त्या तुझ्या
बंधूंचा सोबतीचा दास आहें; नमस्कार देवाला घाल;
येशूविषयींची साक्ष संदेशाचें मर्म[1] आहे.

## विजयशाली ख्रिस्त

११ 'नंतर मीं स्वर्ग उघडलेला पाहिला;' तों पाहा,
एक पांढरा घोडा आणि विश्वासू व सत्य असा म्हटलेला
त्याजवर बसलेला एक स्वार माझ्या दृष्टीस पडला; 'तो
नीतीनें न्यायनिवाडा करितो' व लढाई चालवितो. १२
'त्याचे डोळे अग्नीच्या ज्वालेसारखे' व त्याच्या डोक्यावर
पुष्कळ मुगूट होते; त्यावर एक नांव लिहिलेलें होतें; तें
त्याजवांचून कोणाला कळत नाहीं. १३ रक्तांत बुचकळलेलें
वस्त्र त्यानें अंगावर घेतलें होतें; आणि देवाचा शब्द हें
नांव त्याला देण्यांत आलें होतें. १४ स्वर्गांतील सैन्यें
पांढऱ्या घोड्यांवर बसून पांढरीं व शुद्ध अशीं तागाचीं
तलम वस्त्रें अंगावर घालून त्याच्यामागें चालत होतीं. १५
त्यानें 'राष्ट्रांस मारावें' म्हणून त्याच्या 'तोंडांतून' तीक्ष्ण
धारेची तरवार निघते; तो 'त्यांवर लोखंडी दंडानें राज्य
करील;' आणि 'सर्वसत्ताधारी देव याच्या' तीव्र
क्रोधाच्या द्राक्षारसाचें 'कुंड तो तुडवितो.' १६ त्याच्या
वस्त्रावर व त्याच्या मांडीवर हें नांव लिहिलेलें आहे:
**राजांचा राजा आणि प्रभूंचा प्रभु.**

## त्याच्या शत्रूंचा नाश

१७ नंतर मीं एका देवदूतास सूर्यांत उभें राहिलेलें
पाहिलें; तो अंतराळांतील मध्यभागीं उडणाऱ्या सर्व
पांखरांस उच्च वाणीनें म्हणाला: 'या,' देवाच्या मोठ्या
जेवणावळीस एकत्र व्हा; १८ 'राजांचें' मांस, सर-
दारांचें मांस, 'बळवानांचें मांस, घोड्यांचें' व त्यांवरील
स्वारांचें 'मांस, आणि स्वतंत्र व दास, लहानमोठे अशा
सर्वांचें मांस' 'खावयास' या.

---

१ मुळांत : आत्मा

१९ तेव्हां तें श्वापद, 'पृथ्वीवरील राजे' व त्यांचीं सैन्यें हीं घोड्यावर बसलेल्या स्वाराबरोबर व त्याच्या सैन्याबरोबर लढाई करावयास 'एकत्र झालेलीं' मीं पाहिलीं. २० मग श्वापद धरिलें गेलें आणि त्याबरोबर खोटा संदेष्टाहि धरिला गेला; त्यानें श्वापदाची खूण धारण केलेल्या व त्याच्या मूर्तीला भजणाऱ्या लोकांस त्याच्यासमोर चिन्हें करून ठकविलें होतें. या दोघांना जळत्या गंधकाच्या अग्निसरोवरांत जीवंत टाकण्यांत आलें; २१ बाकीचे लोक घोड्यावर बसलेल्या स्वाराच्या तोंडांतून निघालेल्या तरवारीनें मारिले गेले; आणि त्यांच्या मांसानें सर्व पाखरें तृप्त झालीं.

## एक हजार वर्षें सैतानाला बांधून ठेवणें

२० १ नंतर मीं एका देवदूताला स्वर्गांतून उतरतांना पाहिलें. त्याच्याजवळ अगाधकूपाची किल्ली होती व त्याच्या हातीं एक मोठा सांखळदंड होता. २ त्यानें 'दियाबल,' जो 'सैतान' म्हटलेला जुनाट 'साप' म्हणजे अजगर त्यास धरिलें; हजार वर्षें बांधलेलें राहण्यासाठीं त्याला बांधून अगाधकूपांत टाकिलें; ३ आणि हजार वर्षें पूर्ण होत तोंपर्यंत त्यानें राष्ट्रांस आणखी ठकवूं नये म्हणून वरून बंद करून त्यावर शिक्का मारिला; त्यानंतर त्याला थोडा वेळ सोडिलें पाहिजे.

४ नंतर मीं आसनें पाहिलीं, त्यांवर कोणी बसले होते; त्यांस न्यायनिवाडा करण्याचा अधिकार दिला होता; आणि येशूविषयींच्या साक्षीमुळें व देवाच्या वचनामुळें ज्यांचा शिरच्छेद झाला होता, ज्यांनीं श्वापदाला व त्याच्या मूर्तीला नमस्कार घातला नव्हता आणि आपल्या कपाळावर व आपल्या हातावर त्याची खूण घेतली नव्हती त्यांचे जीवात्मेहि पाहिले. ते जीवंत झाले आणि त्यांनीं ख्रिस्ताबरोबर हजार वर्षें राज्य केलें. ५ मृतांपैकीं बाकीचे लोक, तीं हजार वर्षें पूर्ण होत तोंपर्यंत जीवंत झाले नाहींत; हेंच पहिलें पुनरुत्थान. ६ पहिल्या पुनरुत्थानांत ज्याला भाग आहे तो धन्य व पवित्र आहे; अशा लोकांवर दुसऱ्या मरणाची सत्ता नाहीं, तर ते 'देवाचे' व ख्रिस्ताचे 'याजक' होतील; आणि त्याजबरोबर हजार वर्षें राज्य करतील.

## सैतानाची मुक्तता व शेवटची झटापट

७ तीं हजार वर्षें संपल्यावर सैतानाला आपल्या कैदेंतून सोडण्यांत येईल; ८ आणि तो पृथ्वीच्या चार कोपऱ्यांतील राष्ट्रें, गोग व मागोग, यांस ठकवावयास, त्यांस लढाईसाठीं एकत्र करावयास बाहेर येईल; त्यांची संख्या समुद्राच्या वाळूइतकी आहे. ९ त्यांनीं 'पृथ्वीच्या विस्तारावर' फिरून पवित्र जनांची छावणी व 'प्रिय' नगर वेढिलें; तेव्हां देवापासून स्वर्गांतून अग्नि उतरला आणि त्यानें त्यास 'खाऊन टाकिलें;' १० त्यांस ठकविणाऱ्या सैतानाला 'अग्नीच्या' व 'गंधकाच्या' सरोवरांत टाकण्यांत आलें; त्यांत तें श्वापद व तो खोटा संदेष्टा आहेत; तेथें त्यांस रात्रंदिवस युगानुयुगपर्यंत पीडा भोगावी लागेल.

## सर्वसामान्य पुनरुत्थान व शेवटचा न्याय

११ 'नंतर' मोठें पांढरें राजासन व त्यावर 'बसलेला' एक जण माझ्या दृष्टीस पडला; त्याच्या तोंडापुढून पृथ्वी व आकाश हीं 'पळालीं; त्यांकरितां ठिकाण म्हणून सांपडलें नाहीं.' १२ मग मृत झालेल्या लहानथोरांना मीं राजासनापुढें उभें राहिलेलें पाहिलें. त्या वेळीं 'पुस्तकें उघडलीं गेलीं; तेव्हां' दुसरें एक 'पुस्तक उघडलें गेलें, तें जीवनाचें होतें;' आणि त्या पुस्तकांत जें लिहिलें होतें त्यावरून मृतांचा न्याय 'ज्यांच्या त्यांच्या कर्माप्रमाणें,' ठरविण्यांत आला. १३ तेव्हां जे मेलेले लोक समुद्रांत होते त्यांस समुद्रानें दिलें; जे मेलेले लोक मरणावस्थेंत व अधोलोकांत होते त्यांस त्यांनीं दिलें; आणि ज्यांच्या 'त्यांच्या कर्माप्रमाणें' प्रत्येकाचा न्याय ठरविण्यांत आला. १४ तेव्हां मरण व अधोलोक हीं अग्नीच्या सरोवरांत टाकिलीं गेलीं. अग्नीचें सरोवर हें दुसरें मरण आहे. १५ ज्या कोणाचें नांव 'जीवनाच्या पुस्तकांत लिहिलेलें सांपडलें नाहीं,' तो अग्नीच्या सरोवरांत टाकिला गेला.

## नवें आकाश व नवी पृथ्वी

२१ १ नंतर मीं 'नवें आकाश व नवी पृथ्वी' हीं पाहिलीं; पहिलें आकाश व पहिली पृथ्वी हीं निघून गेलीं आणि समुद्रहि राहिला नाहीं. २ तेव्हां मीं 'पवित्र नगर नवें यरुशलेम' देवापासून

स्वर्गांतून उतरतांना पाहिलें; तें नवऱ्यासाठीं 'शृंगार
केलेल्या नवरीप्रमाणें' सजविलेलें होतें; ३ आणि मीं
राजासनांतून आलेली मोठी वाणी ऐकली. ती म्हणाली:
'पाहा,' देवाचा 'मंडप' मनुष्यांजवळ आहे; त्यांज-
बरोबर 'देव आपली वस्ती करील;' 'ते त्याचे लोक
होतील,' आणि देव स्वतः 'त्यांजबरोबर राहील.' ४
तो त्यांच्या 'डोळ्यांचे सर्व अश्रु पुसून टाकील;' यापुढें
मरण हें नाहीं; शोक, रडणें व कष्ट हींहि नाहींत; कारण
पहिलें होऊन गेलें. ५ तेव्हां 'राजासनावर बसलेला'
म्हणाला, 'पाहा, मी' सर्व 'नवें करितों.' तो म्हणाला,
लिही; कारण हीं वचनें विश्वसनीय व सत्य आहेत. ६
तो मला म्हणाला, त्याप्रमाणें होऊन गेलें आहे. मी अल्फा
व ओमेगा, 'प्रारंभ' व 'शेवट' आहें. मी 'तान्हे-
ल्याला जीवनी' झऱ्याचें 'पाणी फुकट' देईन. ७ जो
कोणी विजय मिळवितो त्याला या गोष्टी वारशानें मिळतील;
'मी त्याचा देव होईन, आणि तो माझा पुत्र होईल;'
८ परंतु भेकड, विश्वास न ठेवणारे, अमंगळ, 'खून कर-
णारे,' जारकर्मी, चेटकी, मूर्तिपूजक, व सर्व लबाड
यांस 'अग्नीच्या व गंधकाच्या जळत्या' सरोवरांत वांटा
मिळेल; हें दुसरें मरण आहे.

## स्वर्गीय यरुशलेम

९ नंतर शेवटल्या 'सात पीडांनीं' भरलेल्या सात
वाट्या ज्यांनीं हातीं घेतल्या होत्या अशा सात देवदूतां-
पैकीं एक देवदूत येऊन मजबरोबर बोलला; तो म्हणाला;
ये, नवरी म्हणजे कोकऱ्याची स्त्री ती मी तुला दाखवितों.
१० तेव्हां मी आत्म्यानें संचरित झालों असतां त्यानें
मला मोठ्या 'उंच डोंगरावर' नेलें, आणि 'पवित्र नगर
यरुशलेम' देवापासून स्वर्गांतून उतरतांना दाखविलें. ११
त्याच्या ठायीं 'देवाचें तेज' होतें; त्याची कांति अति
मोलवान् रत्नासारखी होती; ती स्फटिकाप्रमाणें लखलखणाऱ्या
यास्फे खड्यासारखी होती; १२ त्याला मोठा उंच तट होता;
त्याला बारा वेशी होत्या, आणि वेशींजवळ बारा देवदूत
होते. त्या वेशींवर 'नांवें' लिहिलेलीं होतीं तीं 'इस्राएलाच्या
संतानाच्या' बारा 'वंशांचीं' होतीं. १३ 'पूर्वेकडे तीन
वेशी; उत्तरेकडे तीन वेशी; दक्षिणेकडे तीन वेशी; व
पश्चिमेकडे तीन वेशी होत्या.' १४ नगराच्या तटाला बारा
पायांचे धोंडे होते, त्यांवर कोकऱ्याच्या बारा प्रेषितांचीं
नांवें होतीं. १५ जो मजबरोबर बोलत होता त्याजवळ
नगराचें, त्याच्या वेशींचें व त्याच्या तटाचें मोजमाप
घेण्यासाठीं सोन्याच्या 'बोरुचें माप' होतें. १६ नगर
'चौरस' होतें; त्याची जितकी रुंदी होती तितकीच
त्याची लांबी होती; त्यानें नगराचें माप बोरूनें घेतलें; तें
सहाशें कोस भरलें; त्याची लांबी, रुंदी व उंची समान
होती. १७ मग त्यानें त्याच्या 'तटाचें माप घेतलें,' तें
मनुष्याच्या हातानें एकशें चवेचाळीस हात भरलें;
मनुष्याचा हात म्हणजे देवदूताचा हात. १८ त्याचा
'तट यास्फे' रत्नाचा होता; आणि नगर शुद्ध काचेसारखें
शुद्ध सोनेंच होतें. १९ नगराच्या तटाचे 'पाये' वेग-
वेगळ्या मूल्यवान् रत्नांनीं शृंगारले होते. पहिला पाया
यास्फे, दुसरा नीळ, तिसरा शिवधातु, चवथा पाच, २०
पांचवा गोमेद, सहावा सार्दि, सातवा लसणा, आठवा
वैडूर्य, नववा पुष्कराज, दहावा सोनलसणी, अकरावा
याकींथ, बारावा पद्मराग, असे ते होते. २१ बारा वेशी बारा
मोत्यांच्या होत्या; एकेक वेस एकेका मोत्याची होती; नगरां-
तील 'मार्ग' पारदर्शक काचेसारिखा शुद्ध सोनेंच होता. २२
त्यांत मंदिर माझ्या पाहण्यांत आलें नाहीं; कारण 'सर्व-
सत्ताधारी प्रभु देव' व कोकरा हेच त्याचें मंदिर होत.
२३ नगरावर सूर्याचा किंवा चंद्राचा प्रकाश पडण्याची
गरज नाहीं; 'कारण देवाच्या तेजानें तें प्रकाशित केलें
आहे;' कोकरा त्याचा दीप आहे. २४ 'राष्ट्रें' त्याच्या
'प्रकाशानें चालतील आणि पृथ्वीवरील राजे' आपलें
'वैभव' त्यांत आणितात. २५ त्याच्या 'वेशी दिवसा बंद
होणारच नाहींत; रात्र' तर तेथें नाहींच; २६ 'राष्ट्रांचें
वैभव' व प्रतिष्ठा त्यामध्यें आणितील; २७ 'त्याच्यांत
कांहीं निषिद्ध' आणि अमंगळपणा व असत्य आचरणारा
इसम यांचा 'प्रवेश होणारच नाहीं;' तर 'कोकऱ्याच्या
जीवनी पुस्तकांत लिहिलेल्या लोकांचा मात्र होईल.'

२२ १ नंतर त्यानें देवाच्या व कोकऱ्याच्या राजा-
सनांतून 'निघालेली,' नगरीच्या मार्गावरून
वाहणारी, 'जीवनाच्या पाण्याची' स्फटिकासारखी

निर्मळ ‘ नदी ’ मला दाखविली. २ नदीच्या ‘ दोन्ही
बाजूंस ’ बारा जातींचीं फळें देणारें जीवनाचें झाड
‘ होतें, ’ तें दर महिन्यास आपलीं फळें ’ देतें; आणि
त्या झाडाचीं ‘ पानें ’ राष्ट्रांच्या आरोग्यासाठीं उपयोगी
आहेत. ३ ‘ पुढें कांहींहि शापित असणार नाहीं; ’ तर
त्यांमध्यें देवाचें व कोकऱ्याचें राजासन असेल; आणि
त्याचे दास त्याची सेवा करितील. ४ ‘ ते त्याचें
मुख पाहतील ’ व त्याचें नाम त्यांच्या कपाळांवर
असेल. ५ यापुढें रात्र असणार नाहीं, आणि त्यांस दिव्याच्या
अथवा ‘ सूर्याच्या प्रकाशाची गरज नाहीं; ’ कारण ‘ प्रभु
देव त्यांजवर प्रकाश पाडितो; आणि ते युगानुयुग राज्य
करितील. ’

## समाप्ति

६ नंतर तो मला म्हणाला, हीं वचनें विश्वसनीय व सत्य
आहेत; आणि संदेष्ट्यांच्या आत्म्यांचा देव, जो प्रभु याने
‘ जें कांहीं ’ लवकर ‘ झालें पाहिजे ’ तें, आपल्या दासांस
कळविण्यासाठीं आपल्या दूताला पाठविलें आहे. ७ ‘ पाहा;
मी ’ लवकर ‘ येतों. ’ या पुस्तकांतील संदेशवचनें पाळणारा
तो धन्य.

८ हें ऐकणारा व पाहणारा मी योहान आहें. जेव्हां
मी ऐकलें व पाहिलें तेव्हां हें मला दाखविणाऱ्या देवदूताला
नमस्कार घालण्यास मी त्याच्या पायांपुढें पडलों; ९ परंतु
तो मला म्हणाला, असें करूं नको; मी तुझा, तुझे बंधु
संदेष्टे व या पुस्तकांतील वचनें पाळणारे लोक यांचा
सोबतीचा दास आहें; नमस्कार देवाला घाल.

१० पुनः तो मला म्हणाला, या ‘ पुस्तकांतील ’
संदेशवचनें ‘ शिक्का मारून ’ बंद करूं नको; कारण वेळ
जवळ आली आहे. ११ दुराचारी मनुष्य दुराचार करीत
राहो. मलिनतेनें वागणारा मनुष्य स्वतःला मलिन करीत
राहो; धर्माप्रमाणें वागणारा मनुष्य धर्म आचरीत राहो;
पवित्राचरणी मनुष्य स्वतःला पवित्र करीत राहो. १२
पाहा ‘ मी ’ लवकर ‘ येतों; आणि प्रत्येकाला ज्याच्या
त्याच्या कर्माप्रमाणें देण्यास माझ्याजवळ वेतन ’ आहे.
१३ ‘ मी ’ अल्फा व ओमेगा, ‘ पहिला व शेवटला, ’
प्रारंभ व शेवट, असा आहें. १४ जे आपलीं ‘ वस्त्रें
धुतात ’ ते धन्य; त्यांची ‘ जीवनी झाडावर ’ सत्ता
होईल आणि ते वेशींतून नगरांत जातील. १५ कुत्रे,
चेटकी, जारकर्मी, खून करणारे, मूर्तिपूजक, लबाडीची
आवड धरणारे, व लबाडी बोलणारे लोक सर्व बाहेर
राहतील.

१६ या गोष्टींविषयीं तुम्हांस साक्ष देण्याकरितां मीं
येशूनें आपल्या दूताला मंडळ्यांकरितां पाठविलें आहे. मी
दाविदाचा ‘ अंकुर ’ व संतान, पहाटचा तेजस्वी तारा आहें.

१७ आत्मा व वधू हीं म्हणतात, ये. ऐकणाराहि म्हणो,
ये. तान्हेला ‘ येवो; ’ आणि ज्याला पाहिजे तो जीवनी पाणी
फुकट घेवो.

१८ या पुस्तकांतील ‘ संदेशवचनें ’ ऐकणाऱ्या प्रत्ये-
काला मी निश्चयपूर्वक सांगतों कीं जो कोणी यांत
भर घालील ‘ त्याजवर ’ या पुस्तकांत लिहिलेल्या पीडा
देव आणील; १९ आणि जो कोणी या संदेशाच्या
पुस्तकांतील वचनांतून कांहीं ‘ काढून टाकील ’ त्याचा
वांटा या पुस्तकांत वर्णिलेल्या जीवनी झाडांतून व पवित्र
नगरांतून देव काढून टाकील.

२० या गोष्टींविषयीं साक्ष देणारा म्हणतो, हो; मी
लवकर येतों. आमेन; ये, प्रभु येशू, ये.

२१ प्रभु येशू [ ख्रिस्ता ] ची कृपा पवित्र जनांबरोबर
असो.